إِنَّ هَٰذَا الْقُرْآنَ يَهْدِي لِلَّتِي هِيَ أَقْوَمُ

नि:संशय कुरआन तो मार्ग दाखवतो, जो फारच सरळ आहे

भाष्य

# अहसनुल बयान


उर्दू अनुवादक

मौलाना मोहम्मद जूना गढी

भाष्यांतर

हाफिज़ सलाहुद्दीन मोहम्मद यूसुफ

मराठी अनुवादक

डॉ. मोहम्मद कासिम



प्रकाशक

जमीअते अहले-हदीस, महाराष्ट्र

إِنَّ هَٰذَا الْقُرْآنَ يَهْدِي لِلَّتِي هِيَ أَقْوَمُ

नि:संशय कुरआन तो मार्ग दाखवतो, जो फारच सरळ आहे

भाष्य

# अहसनुल बयान


उर्दू अनुवादक

मौलाना मोहम्मद जूना गढी

भाष्यांतर

हाफिज़ सलाहुद्दीन मोहम्मद यूसुफ

मराठी अनुवादक

डॉ. मोहम्मद कासिम



प्रकाशक

जमीअते अहले-हदीस, महाराष्ट्र

**बिस्मिल्लाहिर्रहमानिर्रहीम**



| | | |
|---|---|---|
| पुस्तकाचे नाव | : | भाष्य अहसनुल बयान |
| भाषा | : | मराठी |
| पृष्ठे | : | १२५९ |
| कुरआनचे उर्दू भाषांतर | : | मौलाना मोहम्मद जूनागढी (रह.) |
| उर्दू भाष्य | : | हाफीज़ सलाहुद्दीन मो. यूसुफ साहब |
| मराठी भाषांतर | : | डॉ. मोहम्मद कासिम |
| रचना व फेरतपासणी | : | डॉ. सईद अहमद फैज़ी, |
| | | अब्दुल रशीद पठाण सर, |
| | | मौलाना फज़लुर्रहमान मोहम्मदी, |
| संगणक कार्य | : | अजय सोनार |
| रचना कार्य | : | अब्दुल वहीद, मोहम्मद ताहा |
| प्रकाशक | : | जमीअते अहले हदीस महाराष्ट्र |
| प्रती | : | २००० |
| प्रकाशन वर्ष | : | ऑगस्ट २००९ |

पत्ता

दफ्तर जमीअते अहले हदीस महाराष्ट्र

दारुलमुतालआ: मोहम्मदिय:

ए. टी. टी. हायस्कूलजवळ, मालेगाव, ज़ि. नासिक, ४२३२०३

بسم اللہ الرحمن الرحیم

# پیش لفظ

مراٹھی زبان میں اسلامی لٹریچر کی کمی کو محسوس کرتے ہوئے اراکین مجلس شوریٰ جمعیت اہلحدیث مہاراشٹر کی ایک اہم میٹنگ منعقدہ ۶/مارچ ۲۰۰۵ء بروز اتوار بمقام مسجد جمیلہ سلیم منشی نگر مالیگاؤں میں باتفاق رائے یہ طے ہوا کہ تفسیر ''احسن البیان'' کا مراٹھی زبان میں ترجمہ کیا جائے چنانچہ جماعت کی بزرگ شخصیت محترم جناب ڈاکٹر محمد قاسم مقیم نندوربار نے ترجمہ کرنے کی ذمہ داری قبول کی۔ موصوف نے اپنی پیرانہ سالی میں عزم محکم کے ساتھ اس عظیم کام کا آغاز کیا اور اللہ کی توفیق سے اسے پایہ تکمیل تک پہنچایا۔ اس دوران موصوف کے ہاتھوں لکھے ہوئے مخطوطات کی کمپوزنگ کروائی گئی۔ اوران ٹائپ شدہ پاروں کی پروف ریڈنگ، ترتیب وتبویب کا فریضہ یہ باسعادت کام محترم جناب عبدالرشید پٹھان سر (مراٹھی ٹیچر ایس ایم خلیل ہائی اسکول)، مولانا فضل الرحمٰن محمدی (نائب ناظم جمعیت اہلحدیث مہاراشٹر) اور راقم الحروف کے حصے میں آیا۔ ہم نے بڑی عرق ریزی کے ساتھ اسے انجام دینے کی کوشش کی۔ ہماری پوری کوشش رہی کہ کسی بھی قسم کی غلطی نہ رہ جائے۔ اسی لئے ہر پارہ کئی کئی بار ہم نے پڑھا۔ اصل دشواری عربی مصطلحات کی ہے جن کا اردو ترجمہ بھی مشکل ہوتا ہے۔ مراٹھی زبان میں تو ناممکن ہی ہے کہ ایک لفظ سے اس کی ترجمانی ہوسکے اس لئے ایسی اصطلاحات کی تشریح کردی گئی ہے۔ ہم اہل علم سے گذارش کرتے ہیں کہ کہیں کسی اصطلاح کا متبادل لفظ نظر آجائے یا کوئی سہو نظر آئے تو ہمیں ضرور اس سے مطلع فرمائیں تاکہ آئندہ اشاعتوں میں اصلاح کرلی جائے۔

یہ کام محض اللہ رب العزت کی اعانت وتوفیق سے مکمل ہوا ہے۔ اب یہ قرآن کریم مع تفسیر، مراٹھی ترجمہ کے ساتھ آپ کے ہاتھوں میں ہے۔ اس مقام پر ہم اللہ تعالیٰ کا شکر ادا کرتے ہیں، ساتھ ہی مراٹھی مترجم محترم جناب ڈاکٹر محمد قاسم صاحب اور نظر ثانی کرنے والے عبدالرشید پٹھان سر اور مولانا فضل الرحمٰن محمدی صاحب اور دیگر معاونین کا بھی شکریہ ادا کرتے ہیں اور دعا گو ہیں کہ اللہ تعالیٰ اسے ہمارے لئے ذخیرۂ آخرت بنائے اور اسے ضلالت وگمراہی کی تاریکی میں بھٹکتی ہوئی انسانیت کے لئے ہدایت کا ذریعہ بنائے۔ آمین! وصلی اللہ علیٰ نبینا محمد وعلیٰ الہ وصحبہ، وبارک وسلم۔

**ڈاکٹر سعید احمد فیضی**

امیر جمعیت اہلحدیث مہاراشٹر



# प्रास्ताविक

'जमीअते अहले हदीस, महाराष्ट्र' शाखेच्या सल्लागार समितीची एक बैठक रविवार, दि. ६ मार्च २००५, रोजी 'मस्जिद जमीला' सलीम मुन्शी नगर, मालेगाव येथे संपन्न झाली. या बैठकीत 'मराठी भाषेत इस्लामी साहित्याची उणीव व कमतरता' या विषयावर विशेष चर्चा झाली. चर्चेअंती सर्वसंमतीने व एकमताने असा निर्णय घेण्यात आला की, 'तफसीर अहसनुल बयान' चे मराठी भाषांतर केले जावे. म्हणून 'जमीअते अहले हदीस' चे ज्येष्ठ सदस्य माननीय श्री डॉ. मोहम्मद कासिम राहणार नंदुरबार यांनी ह्या कार्याची जबाबदारी स्वीकारली. माननीय महोदय हे वयोवृद्ध असून देखील त्यांनी दृढ निश्चयाने ह्या कार्याला सुरूवात केली आणि अल्लाहतआलाच्या प्रेरणेने ह्या श्रेष्ठ कार्याला पूर्णत्वास नेले. यादरम्यान माननीय महोदयांच्या हस्तलिखित भाषांतराची संगणकावर टायपिंग व क्रमबद्ध मांडणी केली गेली.

टायपिंग केलेल्या अध्यायांचे (पार:ची) फेरवाचन, मांडणी व क्रमबद्धरचना करण्याचे हे श्रेययुक्त कार्य आदरणीय श्री अब्दुल रशीद पठाण सर (एस. एम. खलील हायस्कूल, मालेगाव येथील उपशिक्षक), मौलाना फज़लुर्रहमान मोहम्मदी (जमीअते अहले हदीस महाराष्ट्र शाखेचे उप-व्यवस्थापक) आणि माझ्या (डॉ. सईद अहमद फैज़ी) वाट्याला आले आहे. आम्ही अतिशय बारकाईने व दक्षपूर्वक या कार्याला पूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. कोणत्याही प्रकारची चूक राहू नये याची पूर्णपणे दक्षता घेण्यात आली आहे. यासाठी प्रत्येक अध्याय (पार:) आम्ही अनेकवेळा वाचला व तपासला. आम्हाला खरी अडचण अरबी संकल्पनांची आली आहे. ज्याचे उर्दू भाषांतर देखील कठीण असते; आणि मराठी भाषेत तर अशक्यच आहे की, एका शब्दाने त्याची प्रस्तुती होऊ शकेल. म्हणून अशा संकल्पनांचे स्पष्टीकरण केले गेले आहे. आम्ही जाणकारांना विनंती करतो की, अरबी भाषेच्या कोणत्याही संकल्पनेसाठी दुसरा मराठी शब्द आठवल्यास किंवा कोणतीही दुरुस्ती दिसल्यास आम्हाला अवश्य सूचित करावे, जेणेकरून पुढील आवृत्तीमध्ये सुधारणा केली जाईल.

हे कार्य केवळ अल्लाहच्या मदतीने व प्रेरणेने पूर्ण झाले आहे. आता पवित्र कुरआन भाषांतर व मराठी भाष्यासह (तफसीरसह) आपल्या हातात आहे. या ठिकाणी आम्ही अल्लाहचे आभार मानत आहोत. त्याचबरोबर मराठी भाषांतकार आदरणीय डॉ. मोहम्मद कासिम आणि अब्दुल रशीद पठाण सर, मौलाना फज़लुर्रहमान मोहम्मदी व इतर मदतनिसांचेही आभार व्यक्त करत आहोत, आणि अल्लाहतआलाजवळ अशी प्रार्थना करतो की, अल्लाहतआला या कार्याला आमच्यासाठी परलोकात पुण्यप्रतिफळाचे भांडार करो आणि या कार्याला मानहानीच्या व पथभ्रष्टतेच्या अंधारात भटकणाऱ्या मानवतेसाठी प्रेरणेचे माध्यम बनवो! आमीन!

*डॉ सईद अहमद मो. खलील फैज़ी*
अध्यक्ष-जमीअते अहले हदीस, महाराष्ट्र.



# मराठी भाषांतरकर्त्यांचे मनोगत

प्रिय वाचकवृंद,

परम द्याळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो.

सर्व स्तुती सकल जगाचा पालनकर्ता अल्लाहतआलालाच योग्य होय आणि आमचे पैगंबर ह. मोहम्मद मुस्तफा (सल्ल.) वर सलाम आणि शांती असो!

सर्वप्रथम मी निवेदन करीत आहे की, अल्लाहने इच्छिल्याशिवाय कोणीही मनुष्य सन्मार्गाची (हिदायत) सुबुद्धी मिळवू शकत नाही. अल्लाहतआलाने, लोकांनी सरळ मार्गाला लागावे म्हणून वेळोवेळी आकाशी ग्रंथ उतारले आणि पैगंबर वृंदांना पाठवित राहिला. ही शृंखला कुरआन मजीद आणि ह. मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर अल्लाहने समाप्त केली. यांच्यानंतर कुठलाही आकाशी ग्रंथ आणि पैगंबर येणार नाही. धर्मात जोर जबरजस्ती नाही. अल्लाहने चांगले काय आणि वाईट काय हे आपल्या पुस्तकाने आणि पैगंबरांद्वारे, बुद्धीला पटणारी प्रामाण्ये देऊन पटवून दिले आणि मानवाला स्वातंत्र्य दिले आहे की, त्याला पटणारा मार्ग त्याने अंगिकारावा. कारण हे इहलोक परीक्षास्थळ आहे आणि परलोक या परीक्षेच्या निकालाचे स्थळ आहे.

माझे वडील एका हिंदू कुटुंबात जन्माला आले. ते जेव्हा प्रौढत्वाला पोहचले तेव्हा अल्लाहने त्यांच्या मनात विचार टाकला की, मला अल्लाहने का निर्माण केले? मृत्यूनंतर पुन्हा दुसरे जीवन आहे काय? मी जी कर्मे करीत आहे त्यांचा कधी मला जाब विचारला जाणार आहे काय? जगात जे इतके धर्म प्रचलित आहेत, त्यापैकी कोणता धर्म परमेश्वरापर्यंत पोहचवून देणारा आहे? मग त्यांनी प्रथम ते हिंदू होते म्हणून, रामायण, महाभारत, भागवत, पुराणे, वेद वगैरे हिंदू धर्मग्रंथांचे अवलोकन केले. तरी त्यांना आत्मिक शांती मिळाली नाही.

विशेषत: पुनर्जीवन, मनुष्याला ८४ हजार योनीतून जन्म घेऊन मग मोक्षाला पावणे आणि ईशतत्त्वात विलीन होणे, अनेकेश्वरवाद ३३ कोटी देव, वगैरे कल्पना बुद्धीला न पटणाऱ्या होत्या.

नंतर काही खिस्ती लोकांनी त्यांना बायबल (नवा करार आणि जुना करार) तौरात आणि इंजील, मराठीत वांचावयास दिले. जरी या आकाशी ग्रंथात इस्राईली लोकांनी ऐहिक फायद्यासाठी फेरफार आणि घालघुसड केलेली असली तरी आकाशी ग्रंथ असल्याने, माझ्या वडिलांना, ते हिंदूधर्मग्रंथापेक्षा फारच चांगले वाटले; येथ पावेतो की, त्यांना वाटू लागले की खिस्ती धर्म अंगिकारण्यास हरकत नाही. परंतु जो मनुष्य निर्मळ अंत:करणाने अल्लाहकडे वळतो, अल्लाह त्याला त्याच्यापर्यंत पोहचण्याचा मार्ग सुकर करुन देतो.

झाले असे की, त्या दिवसात त्यांच्याकडे एक मराठी साप्ताहिक, ''दीन मित्र'' जे अहमदनगरहून प्रकाशित होत असे, येत असे. त्यांत एक दिवस जाहिरात आली, ''कुरआनाचे मराठी भाषांतर विक्रिस तयार.'' त्यांनी हे कुरआनाचे मराठी भाषांतर मागवून वांचावयाचे ठरविले.

हे कुरआनाचे पहिले मराठी भाषांतर होते. जे हैद्राबादच्या निजामाने, मराठवाड्यातील बहुसंख्य मुसलमान जे फक्त मराठीच जाणत होते त्यांच्या करीता रत्नागिरीतील एक धर्मपंडीत, हकीम, मीर, सुफी मौलवी याकूब साहेब यांच्याकडून करवून घेतले. ते सन १९१८ मध्ये पायधुणी मुंबईहून प्रकाशित झाले.

सदर मराठी कुरआन माझ्या वडिलांनी वाचल्यानंतर अल्लाह तआलाने त्यांच्या हृदयाची किवाडे उघडून दिली आणि त्यांत कुफ्रचा अंधकार मिटवून, हिदायतच्या प्रकाशाने, त्याला उज्वळ करुन दिले. माझ्या वडिलांनी विचार केला की हेच तर आहे की ज्याच्या शोधात मी इतके दिवस भटकत होतो. मग त्यांनी सहकुटूंब सहपरिवार इस्लामचा जगजाहिररित्या अंगिकार केला. त्याकाळात बुद्धीवान लोकांनी निरपेक्षवृत्तीने या मराठी कुरआनचे अवलोकन केले, तर कित्येक हिंदू, इस्लाम धर्मात दाखल होऊन गेलेत. याचे सर्व श्रेय अल्लाहतआलालाच. कारण जोपर्यंत तो इच्छिणार नाही, तुम्ही काहीही इच्छू शकत नाही.

मुसलमान झाल्यानंतर मुसलमान समाजाशी जेव्हा संबंध आला, तेव्हा माझ्या वडिलांना असे आढळून आले की, कुरआनाने रेखाटलेल्या मुसलमानाचे चित्र, आणि मला दिसणाऱ्या मुसलमानांचे जीवन हे फारच वेगळे आहे. सर्वसाधारण मुसलमान रस्म रिवाज (रुढी परंपरा) मध्ये, बिदअत मध्ये, कबरपुजेच्या शिर्कमध्ये व्यस्त आहेत. त्यांचा कुरआन व हदीसशी काहीही संबंध नाही आणि ते ज्या आचरणात व्यस्त आहेत त्यालाच इस्लाम आणि खरी

''मुसलमानी'' समजतात. मी जर या मुसलमान लोकांत राहिलो तर माझी संतती त्यांच्या सहवासाने बिघडून जाईल. जर त्यांना कुरआन व हदीसप्रमाणे त्यांची जडण घडण, म्हणजे श्रद्धा आणि धारणा करावयाच्या असतील, तर त्यांना या प्रचलित मुसलमान समाजापासून दूर ठेवावयास पाहिजे. म्हणून ते मुसलमान वस्तीपासून दूर घर बांधून राहू लागले.

पुदे जाता माझ्या वडिलांच्या ही हदीस वाचनात आली की, ''ग्रंथधारी लोकांचे ७२ पंथ झाले. पण माझ्या उम्मतीचे ७३ पंथ होतील. त्यांतील एक पंथ मुक्ती पावणारा असेल, बाकी सर्व नर्कवासिय होतील.'' सहाबांनी विचारले तो मुक्ति पावणारा पंथ कोणता? हुजुर (सल्ल.) नी उत्तर दिले, ''ज्यावर मी आणि माझे सहाबा आहेत!''

तेव्हा माझे वडील काळजीत पडले आणि त्यांनी प्रार्थना केली ''हे माझ्या पालनकर्त्या! जेव्हा तू आपल्या कृपेने मला कुफ्रच्या अंध:कारातून काढून इस्लामच्या प्रकाशांत आणलेय, तर तुच मला आता त्या मोक्ष पावणाऱ्या, ज्यावर आमचे पैगंबर (सल्ल.) आणि त्यांचे सहाबा होते त्या मार्गावर पोहचवून दे।''

नंदुरबार येथील एक जहागिरदार सईद मियॉ, यांचेकडे त्यावेळी पंजाबातून एक मौलवी अब्दुर्रहीम येऊन राहिले होते. ते अहले हदीस होते. त्यांच्या भाषणामुळे, कित्येक लोक त्यांच्या भोवती, खऱ्या इस्लामची ओळख होण्यासाठी जमू लागले. माझे वडील सुद्धा जाऊ लागले. नंदुरबारमधील कित्येक हनफी लोक अहलेहदीस होऊन गेले. त्यात माझे वडील सुद्धा अहले हदीस झाले. अल्लाहने ह. मौलाना अब्दुर्रहीम साहेबांच्या मार्फत हिदायत दिली की, जैताणे. ता साक्री येथील काही मुसलमानांनी अहले हदीस पंथ स्वीकारला जो फक्त कुरआनवर आधारित आहे. अलहम्दुलिल्लाह!!

जमीअत अहले हदीस महाराष्ट्र चे अमीर डॉ. सईद अहमद फैजी साहेब आणि त्यांच्या साथीदारांनी असे ठरविले की, दक्षिण महाराष्ट्रातील मराठी भाषिक मुसलमान आणि महाराष्ट्रातील मुसलमानेतर मराठी भाषिकांसाठी, कुरआनाचे उर्दू भाषांतर आणि भाष्यचे ''अहसनुल बयान'' मराठी अनुवाद करण्यात यावा.

मी धर्मपंडीत नाही, एक सर्वसाधारण मुसलमान आहे. माझे शिक्षण मॅट्रीक पर्यंत मराठी माध्यमातून आणि पुढे डॉक्टरी शिक्षण इंग्रज़ीतून झाले. उर्दू आणि अरबी शिक्षण बाहेरुन झाले.

मी एक नावलौकीक नसलेला, सर्वसामान्य मुसलमान आहे. ही तर अल्लाहतआलाची खास कृपा झाली की, त्याने माझ्या सारख्या सर्वसामान्य माणसाकडून आपल्या महान पुस्तकाचे मराठी भाषांतर करवून घेतले! अल्हम्दु लिल्लाहि हम्दन् कसीरन तय्यबन मुबारकन फीही!

अल्लाहचे आभार मानल्यानंतर मी जमीअते अहले हदीस महाराष्ट्रच्या सल्लागार समितीचे आभार मानतो ज्यांनी ही सुवर्ण संधी मला दिली. शेवटी अल्लाहतआलाने या कामाला मान्य करुन, याला आमच्यासाठी सदक–ए–जारिया करावे आणि परलोकात आम्हाला मुक्ती द्यावी, ही त्याच्याजवळ नम्र विनवणी.

वाचकांनी आणि धर्मपंडितांनी यांत त्यांना ज्या चुका आढळून येतील, त्या निदर्शनास आणून द्याव्यात म्हणजे पुढील आवृत्तीमध्ये दुरुस्ती करता येईल.

नंदुरबार — आपला नम्र

दिनांक : — डॉ. मोहम्मद कासिम

महावाक्ये ७ | भाषांतर सूरतुल[१] फातेहा मक्की[२] यात सात महावाक्ये आहेत[३] | रुकूअ १

آیاتها ٧ | (١) سُورَةُ الْفَاتِحَةِ مَكِّيَّة | رکوعها ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ ○

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो ○

اَلْحَمْدُ لِلّٰهِ رَبِّ الْعٰلَمِيْنَ ۝١

सर्व स्तुती अल्लाहसाठी[५] आहे, जो सकल जगाचा पालनकर्ता आहे.[६] ①

الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ ۝٢

तो परम दयाळू आणि कृपाळू[७] आहे.②

مٰلِكِ يَوْمِ الدِّيْنِ ۝٣

तो निर्णयाच्या दिवसाचा मालक[८] आहे.③

اِيَّاكَ نَعْبُدُ وَاِيَّاكَ نَسْتَعِيْنُ ۝٤

आम्ही फक्त तुझीच भक्ती करीत आहोत आणि फक्त तुझीच मदत[९] मागीत आहोत④

اِهْدِنَا الصِّرَاطَ الْمُسْتَقِيْمَ ۝٥

आम्हाला सरळ मार्ग दाखीव[१०].⑤

صِرَاطَ الَّذِيْنَ اَنْعَمْتَ عَلَيْهِمْ ۝٦ غَيْرِ الْمَغْضُوْبِ عَلَيْهِمْ وَلَا الضَّآلِّيْنَ ۝٧

(म्हणजे) त्या लोकांचा मार्ग, ज्यांच्यावर तू कृपा[११] केली आहेस!⑥ पण ज्यांच्यावर तुझा कोप झालेला आहे, त्यांचा[१२] (मार्ग) नको आणि आडमार्गी भटकणाऱ्यांचाही नको.⑦

(१) सूरतुल फातेहा कुरआन शरीफचा सर्व प्रथम अध्याय आहे. हदीसमध्ये याचे खूपच श्रेष्ठत्त्व वर्णन केले गेले आहे. फातेहा चा अर्थ प्रारंभ आणि सुरूवात असा आहे. यासाठी याला अल फातेहा म्हणजे पुस्तकाची (कुरआन) सुरूवात म्हटले जाते. हदीस मध्ये याची आणखी निरनिराळी नावे आलेली आहेत. उदा.उम्मुल कुरआन, अस्सबउल मसानी, अल कुरआनुल अजीम, अश्शिफा, अर्रूकयह्(दम), फातेहतुल किताब, शिफाउन मिन कुल्ले सम्मिन (सूरह फातेहा प्रत्येक विषाचा इलाज आहे.)(दारमी)

एका सहाबी ﷺ नी एका विंचू चावलेल्या माणसावर याचा दम केला तर त्याला आराम पडला. पैगंबर साहेबांनी त्याला विचारले की तुला कसे ठाऊक झाले. की सू.फातेहा हा दम आहे ? याचे एक नाव सलात पण आहे. एका हदीस कुदसी प्रमाणे अल्लाह ने म्हटले आहे की, मी सलातीला माझ्यात आणि माझ्या सेवकात वाटून टाकले आहे. (सही मुस्लीम किताबुस्सलात) याच्याने उद्देश सू.फातेहा आहे. ज्याचा अर्धा भाग, अल्लाहची स्तुती प्रशंसा, आणि त्याची दया आणि सर्वांचा पालनकर्ता, न्याय आणि त्याच्या राज्याच्या वर्णनात आहे आणि अर्ध्याभागात, प्रार्थना आहे जी एक बंदा अल्लाह च्या दरबारात करतो. या हदीस मध्ये सू.फातेहा ला नमाज प्रमाणे म्हटले आहे यामुळे हे स्पष्ट ध्वनित होते की नमाजमध्ये याचे पढणे अत्यंत जरूरी आहे. म्हणूनच नबी करीम ﷺ च्या कथनात, याचे खूप स्पष्टीकरण केले गेलेले आहे. ''त्या व्यक्तीची नमाज नाही, जीने सू.फातेहा नमाजीत पढली नाही.''(सहीह बुखारी व स. मुस्लीम)

या हदीसमध्ये 'मन' चा शब्द सर्वासाठी आहे. जीत, सर्व नमाज पढणारे येतात, मग तो एकटा नमाज पढणारा असो, इमाम असो, इमामच्या मागे नमाज पढणारे मुक्तदी असो, मनातल्या मनात पढली जाणारी नमाज (सिर्री) असो किंवा मोठ्याने पढली जाणारी (जहरी) असो, फर्ज नमाज असो, अथवा नफील नमाज असो, प्रत्येक नमाज पढणाऱ्यासाठी सू.फातेहा पढणे अनिवार्य आहे. या गोष्टीची पुष्टी, त्या हदीसमुळे होते, जीत म्हटले आहे की, एकदा फज्रच्या नमाजीच्या वेळी, काही सहाबा ﷺ सुद्धा नबी करीम ﷺ बरोबर कुरआनाचे पठण करू लागले. ज्यामुळे नबी करीम ﷺ वर कुरआनाचे पठण करणे कठीण होऊ लागले. नमाज संपल्यावर, नबी करीम ﷺ नी विचारले काय तुम्ही सुद्धा माझ्याबरोबर कुरआनाचे पठण करीत होता ? त्यांनी होकारार्थी उत्तर दिले. त्यावर हुजूर ﷺ नी सांगितले, तुम्ही असे करीत जाऊ नका, (म्हणजे माझ्या बरोबर-बरोबर पठण करीत जाऊ नका) परंतु सू.फातेहाचे जरूर पठण करा, कारण याच्या पढण्या शिवाय नमाज होतच नाही (अबु दाऊद, तिरमिझी, निसाई) ह.अबु हुरैरा ﷺ च्या कथनाप्रमाणे नबी करीम ﷺ चे बयान आहे की, ज्याने सू.फातेहा शिवाय नमाज पढली ती नाकीस (अर्धवट) आहे. हुजूर ﷺ नी ही

गोष्ट तीन वेळा सांगितली. अबु हुरैरा ﷺ ला प्रश्न केला गेला, आम्ही इमामच्या मागे नमाज पढत आहोत त्यावेळी काय करावे? ह.अबु हुरैरा ﷺ नी सांगितले, तुम्ही इमामच्या मागे असाल त्यावेळी, सू.फातेहाचे मनात पठण करा. (सहीह मुस्लीम)

चर्चीत दोन्ही हदीसींनी हे स्पष्ट होते की कुरआन मजीद मध्ये जे आलेले आहे, जेव्हा कुरआन वाचले जाईल तेव्हा ऐका, आणि खामोश रहा. (सू.आअराफ २०४) किंवा हदीस, ''जेव्हा इमाम किरअत करेल (कुरआनाचे पठन) तेव्हा खामोश रहा.'' याचा अर्थ असा की मोठ्याने पढल्या जाणाऱ्या (जहरी) नमाजी मध्ये मुक्तदीने (इमामच्या मागे नमाज पढणाऱ्यांनी) सू.फातेहा शिवाय, दुसरी किरअत खामोश राहून ऐकावी. इमाम बरोबर कुरआनाचे पठण करू नये. इमामाने सू.फातेहा थांबून-थांबून पढावी म्हणजे मुक्तदी पण सही हदीसप्रमाणे सू.फातेहा पढू शकतील किंवा इमामाने सू.फातेहा पढल्यानंतर इतका वेळ थांबावे की, त्यावेळात मुक्तदी पण सू. फातेहा पढून घेतील. या प्रमाणे कुरआनी महावाक्य आणि स.हदीस मध्ये, अल हम्दो लिल्लाह कुठलाही टकराव राहत नाही, दोहोंवर अंमलबजावणी होऊन जाते, जर सू.फातेहाच्या पढण्यावर बंदी केली, तर कुरआन करीम आणि स.हदीसमध्ये टकराव होतो आणि दोन गोष्टीपैकी कोणा एका गोष्टीवरच अंमल होऊ शकतो. एकाच वेळी दोन्ही गोष्टीवर अंमल करणे शक्य नाही. या गोष्टीच्या आणखी तपशीलासाठी कृपया खालील पुस्तके पाहावीत.

''तहकीकुल कलाम'' मौलाना अ.रहेमान मुबारक पूरी (रह.)

''तवजीहुल कलाम'' मौलाना इरशादुल हक हफीजुल्लाह वगैरे. त्या शिवाय कृपया पाहा. सू.आअराफ महावाक्य २०४ चा समास

(२) अध्याय मक्की आहे. मक्की किंवा मदनीचा अर्थ असा की, जे अध्याय हिजरतच्या आधी / अगोदर अवतरीत झालेत ते मक्की आहेत. जरी त्यांचे अवतरण मक्का मुकर्रमा मध्ये झालेले असो किंवा मक्केच्या आजू बाजूच्या परिसरात झालेले असो. आणि मदनी अध्याय ते आहेत जे हिजरतनंतर अवतरीत झालेत. मग ते मदीना किंवा त्याच्या आजूबाजूच्या परिसरात अवतरीत झालेले असोत, किंवा त्याच्या पासून दूर इतपावेतो की मक्का किंवा त्याच्या परिसरात जरी अवतरीत झालेले असोत. (तरी ते मदनीच आहे.)

(३) ''बिसमिल्लाह'' बाबत वाद आहे की, हे प्रत्येक अध्यायाचेच एक महावाक्य आहे, किंवा हे फक्त सू. फातेहा चे एक महावाक्य आहे, किंवा कुठल्याही अध्यायाचे एक महावाक्य नाही, याला फक्त अध्यायाना वेगवेगळे करण्यासाठी, अध्यायाच्या सुरवातीला लिहिले जाते. मक्का आणि कूफाचे कुरआनाचे पठण करणारे (कुर्रा) सू.फातेहा सहित सर्व अध्यायांचे एक महावाक्य, असे मानतात. त्याच्या उलट मदीना, बसरा, व शामचे कुर्रा (कुरआनाचे पठण करणारे) याला कुठल्याही अध्यायाचे महावाक्य मानत नाहीत. शिवाय सू.नमल चे ३० वे महावाक्य ज्यात योगा-योगाने ''बिसमिल्लाह' हा त्या महावाक्याचा एक भाग आहे, त्याचप्रमाणे मोठ्याने पढल्या जाणाऱ्या (जहरी) नमाजीत मोठ्या आवाजाने बिसमिल्लाह म्हणण्यावर वाद विवाद आहे. काही लोक मोठ्या आवाजाने म्हणणाऱ्यांच्या पक्षाचे आहेत तर काही लोक मनातल्या मनात पढणाऱ्यांच्या बाजूचे आहेत. (फत्हुल कदीर) बहुतेक अहिले हदीस उलमा (धर्म-पंडीत) मनातल्यामनात म्हणण्याला दुजोरा देतात. तरी सुद्धा मोठ्या आवाजाने पढणेपण रास्त आहे.

(४) ''बिसमिल्लाह'' चे सुरवातीमध्ये, अल्लाहच्या नावाने पढतो किंवा सुरू करतो, किंवा वाचन करतो, हे अध्यारूत आहे. प्रत्येक महत्त्वाच्या कामाची सुरवात करण्यापूर्वी ''बिसमिल्लाह'' म्हणण्याची ताकीद दिली गेली आहे. यासाठी हुकूम दिला गेला की, जेवणापूर्वी, जबह करतांना,वजू करतांना संभोग करण्यापूर्वी बिसमिल्लाह म्हटले जावे. तथापि कुरआन शरीफचे पठण करण्यापूर्वी बिसमिल्लाहिर्रमानिर्रहीम च्या पूर्वी आऊजो बिल्लाहि मिनश्शैतानिर्रजीम' म्हणणे पण आवश्यक आहे.''जेव्हा तुम्ही कुरआन वाचू लागाल, तेंव्हा फिटकारलेल्या सैतानापासून तुम्ही अल्लाहचा आश्रय मागीत जा'' (सू.नहल ९८)

(५) ''अलहम्दो लिल्लाह'' स्तुती आणि कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आहे. सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे. किंवा स्तुती खास अल्लाह करताच आहे. कारण स्तुतीचा हकदार आणि स्तुतीसाठी पात्र फक्त अल्लाहतआलाच आहे.

कोणामध्ये काही गुण, सुंदरता, आणि कमाल आहे, तर ते अल्लाहकडून निर्मित झालेले आहे. म्हणूनच स्तुतीचा हक्कदार पण अल्लाहच आहे. ''अल्लाह'' हे अल्लाहचे वैयक्तीक नाव आहे. याचा उपयोग दुसऱ्यासाठी करणे योग्य नाही. ''अल हम्दो लिल्लाह'' हे कृतज्ञता व्यक्त करणारे बोल आहेत. यांचे हदीस मध्ये बरेच महत्त्व श्रेष्ठत्व आलेले आहेत. एका हदीस मध्ये ''ला इलाह इल्लल्लाह'' ला श्रेष्ठ जप व'' अल हम्दो लिल्लाह'' ला श्रेष्ठ प्रार्थना म्हटले आहे (तिरमिझी, निसाई वगैरे) स.मुस्लीम व निसाई मध्ये वर्णन आहे की ''अल हम्दो लिल्लाह'' तराजू (पुण्याच्या पारड्या) ला भरून देतो. या करीता एका दुसऱ्या हदीसमध्ये आले आहे की अल्लाह या गोष्टीला पसंत करतो की प्रत्येक खाण्यापिण्याच्या वस्तुंवर बंद्याने त्याची स्तुती करावी. (स.मुस्लीम)

(६) ''रब'' अल्लाहतआलाच्या उत्कृष्ट नावांपैकी एक नांव आहे. याचा अर्थ आहे, प्रत्येक वस्तुचा निर्माता, त्यांना लागणाऱ्या वस्तू पुरविणारा, आणि संपूर्णत्वापर्यंत नेणारा. ''रब'' या शब्दाचा उपयोग अल्लाह शिवाय दुसऱ्या कोणासाठी करणे योग्य नाही.

''रब्बुल आलमीन'' (सकल जगाचा पालनकर्ता) सर्वांच्या गरजा, त्यांच्या आवश्यकतेप्रमाणे आणि शारीरिक, प्राकृतिक नुसार पुरवीत असतो.

(७) ''रहमान'' म्हणजे खूपच मेहेरबान आणि रहीम म्हणजे अत्यंत दयाळू. हे शब्द अतिशयोक्तीची परीसीमा आहे. या शब्दात मुबलकता आणि स्थैर्याचा आशय आढळतो. म्हणजे अल्लाहतआला खूप दया करणारा आहे. आणि त्याचे हे वैशिष्ट्ये, दुसऱ्या वैशिष्ट्याप्रमाणे कायमस्वरूपी स्थिर आहे. काही धर्मपंडीतांचे म्हणणे आहे, रहमान मध्ये रहीम पेक्षा जास्त अतिशयोक्ती आहे. यासाठी ''रहमानु ददुनिया वल आखेरहः'' म्हटले जाते. या जगात त्याची दया सर्वांसाठी आहे. त्यामुळे नास्तिक असो वा विश्वासू सर्वांना त्याची दया मिळत राहते, आणि परलोकांत अल्लाह फक्त रहीम राहणार आहे. म्हणजे त्याची दया फक्त विश्वासुंसाठी खास राहील. अल्लाहतआला त्या लोकात आम्हालाही शामील करून घेवो. (आमीन)

(८) या जगात सुद्धा कर्माप्रमाणे फळे एका मर्यादेपर्यंत मिळत असतात. तथापि परलोकांत कर्मांची फळे पूर्ण पणे दृष्टी गोचर होतील. अल्लाहतआला प्रत्येक व्यक्तीला त्याच्या कर्माप्रमाणे पुरस्कार किंवा दंड देईल. अशाचप्रकारे या इहलोकात, तात्पुरत्या स्वरूपात काही लोकांकडे कारणपरत्वे काही अधिकार दिलेले असतात. परंतु परलोकांत सर्व प्रकारचे अधिकार अल्लाहतआलालाच राहतील. अल्लाहतआला त्या दिवशी प्रश्न करील, आज कोणाचे राज्य आहे? मग तो स्वत:च उत्तर देईल की ''आज फक्त एका जबरदस्त अल्लाहचे राज्य आहे.'' (सू. अलमोमिन-१६) त्या दिवशी कुणी व्यक्ती कुणासाठीही काहीही अधिकार बाळगणार नाही. सारा मामला अल्लाहच्या हातात असेल. (सू. अल इनफितार - १९)

(९) 'उपासना' चा अर्थ, कुणाच्या प्रसन्नतेसाठी अगदी टोकाची विनयशिलता व विनम्रता जाहीर करणे. इब्ने कसीरच्या म्हणण्याप्रमाणे धर्मशास्त्रात प्रेमाची परीसीमा, विनम्रता आणि भय यांच्या समूहाला म्हणता येईल. म्हणजे अल्लाहशी प्रेमही असावे, तसेच त्याच्या अमर्याद सामर्थ्यापुढे विनम्रशिलता आणि लाचारी जाहीर केली जावी. आणि त्याच्या सामर्थ्यामुळे, त्याच्याकडून पकड होण्याची भीतीही असावी.

''आम्ही तुझी भक्ती करीत आहोत आणि तुझी मदत मागीत आहोत'' ही झाली सरळ भक्ती, परंतु अल्लाहतआलाने या मागणीला जोरकस करण्यासाठी, ''आम्ही तुझीच भक्ती करीत आहोत व तुझीच मदत मागीत आहोत'' अशी प्रार्थना करावयास सांगितले. भक्ती आणि मदत मागणे अल्लाहतआला शिवाय इतरांकरीता अयोग्य आहे, या शब्दांनी शिर्कचे पूर्ण खंडन करण्यात आले आहे. परंतु ज्यांच्या मनात शिर्कचा रोग आहे, ते साधनांशिवाय किंवा साधनाच्या अधिन राहून, मिळणाऱ्या मदतीतील फरक दृष्टीआड करून सर्व सामान्यांना वैचारिक गोंधळात टाकून देतात. ते सांगतात, पाहा आपण आजारी होतो तेव्हा डॉक्टरांची मदत घेतो, पत्नीकडून मदत इच्छितो, ड्रायव्हर आणि इतर माणसांकडून मदतीची अपेक्षा ठेवतो, त्यावरून ते हे सिद्ध करतात की अल्लाहशिवाय इतरांकडून देखील मदत मागता येते, वास्तविक कार्यकारण भावाने, एक दुसऱ्यांकडे मदत मागणे, व एक दुसऱ्यांची मदत घेणे हे शिर्क नाही,

ही तर अल्लाहतआलाने तयार केलेली एक व्यवस्था आहे. ज्याने सर्व कामे कार्यकारणभावाप्रमाणेच होत असतात. इतकेच काय पैगंबर सुद्धा माणसांची मदत प्राप्त करत असतात ह. ईसा عليه السلام नी म्हटले ''अल्लाहच्या धर्माप्रित्यर्थ कोण माझी मदत करणार''? (सू.अस्सफ -१४) अल्लाहतआला हुकूम देतो ''पुण्य आणि ईश भयाच्या कामांसाठी एक दुसऱ्यांची मदत करा'' (सू.अल माइदः-२) स्पष्ट आहे, ही मदत योग्य आहे शिर्क नाही. उलट अशी मदत केली गेली पाहिजे. या मदतीचा ''शिर्क'' शी काय ताळमेळ? ''शिर्क'' तर हे आहे की अशा व्यक्तीकडे मदत मागणे जी स्पष्टपणे मदत करू शकत नाही. जसे एखाद्या मृत व्यक्तीकडे मदतीची याचना करणे, त्याला विघ्नहर्ता व इच्छापूर्ती करणारा समजणे, नफा आणि नुकसान पोहचविणारा, जवळून आणि फार लांबून प्रत्येकाची याचना (मदतीची अपेक्षा) ऐकण्याचे त्याचे सामर्थ्य आहे असे समजणे, आणि त्याच्यात अल्लाहची गुण वैशिष्टये आहेत असे मानणे याचे नांव शिर्क आहे, जे दुर्दैवाने ''औलीया अल्लाहचे प्रेम'' या नांवाने मुसलमानां मध्ये सर्वदूर आढळते. (अल्लाह आम्हाला अशा लोकात होण्यापासून वाचवो. आमीन)

## ''तौहीद'' (एकेश्वरवाद) चे तीन प्रकार :

अशावेळी वाटते की तौहीदचे ३ मुख्य प्रकार सांक्षेपपणे वर्णन करून द्यावेत. हे प्रकार आहेत -

(१) तौहीद रूबुबियत (स्वामित्व) (२) तौहीद उलुहियत (उपास्यत्व) (३) तौहीद सिफात (गुणसंज्ञा)

(१)तौहीद रूबुबियतचा अर्थ असा आहे की, या ब्रम्हांडाचा निर्माता, पालनकर्ता, सर्वांना रोजी देणारा, आणि सर्वांची व्यवस्था करणारा फक्त अल्लाहतआलाच आहे. या तौहीदला नास्तिक आणि निरीश्वरवादी यांच्याशिवाय सर्व लोक मान्य करतात. येथपावेतोकी बहुदेववादी (मुशरिकीन) पण याला मान्यता देत आले आहेत. जसा कुरआन करीमने मक्केच्या बहुदेववादी लोकांच्या या मान्यतेबाबत उल्लेख केला आहे. उदा. ''हे पैगंबरा ! या लोकास विचार की तुम्हास आकाशातून आणि पृथ्वीतून कोण रोजी पुरवितो? अथवा तुमचे कान व डोळेवर कोणाची सत्ता आहे? आणि तो कोण आहे जो जिवंतास मेलेल्यातून काढतो? आणि मेलेल्यास जिवंतातून काढतो? आणि सृष्टित प्रत्येक कामाची व्यवस्था कोण लावतो? तेंव्हाच बोलू लागतील की ''अल्लाह''. (म्हणजे हे सर्व कामे करणारा अल्लाह आहे.)'' (सू.यूनुस महावाक्य ३१) दुसऱ्या ठिकाणी कुरआनात अल्लाहचे फरमान आहे, ''आणि जर आपण यांना विचारशील की, आकाश आणि पृथ्वी कोणी निर्माण केली तर, ते नक्की हेच म्हणतील की, ''अल्लाहने''. (सू. जुमर महावाक्य ३८) आणखी एका ठिकाणी सांगितले, विचारा तर खरे! की, पृथ्वी आणि तिच्या सर्व वस्तू कोणाच्या आहेत? सांगा, जर तुम्ही जाणत असाल? ⑧४ लगेच उत्तर देतील की, अल्लाहच्या! सांगून टाका की मग तुम्ही उपदेश का ग्रहण करीत नाही? ⑧५ यांना विचारा की सात आकाशांचा आणि महान अर्ष-सिंहासनाचा मालक कोण आहे? ⑧६ ते लोक उत्तर देतील की, अल्लाहच आहे; आपण सांगून द्या की, मग तुम्ही का भीत नाही? ⑧७ यांना विचारा की सर्व गोष्टींचा अधिकार कोणाच्या हातांत आहे? जो आश्रय देतो; आणि ज्याच्या मुकाबल्यांत कोणाला आश्रय दिला जात नाही; जर तुम्हास ठाऊक असेल तर सांगा! ⑧८ ते हेच उत्तर देतील की अल्लाहच आहे; आपण सांगून द्या की, मग तुम्ही कोठे जादू करून दिले जात आहात? ⑧९ (सू.अल-मूमिनून: ८४ ते ८९)

(२) ''तौहीद उलुहियत'' चा अर्थ असा की, उपासनेचे (इबादत) सर्व प्रकार फक्त अल्लाहसाठीच आहेत. आणि उपासना म्हणजे ते काम, जे कोण्या खास व्यक्तीच्या प्रसन्नतेसाठी, किंवा त्या व्यक्तीच्या अप्रसन्नतेच्या भयाने केले जाते. म्हणून फक्त नमाज, उपवास आणि हज, जकात हीच उपासना नाही. परंतु कोण्या खास व्यक्तीकडे दुआ, इल्तेजा करणे, त्याच्या नावाने मन्नत करणे, त्याच्या समोर हाथ बांधून उभे राहणे, त्याला प्रदक्षिणा (तवाफ) घालणे, त्याच्याशी आशा व भय राखणे, वगैरे पण उपासनेत मोडतात. ''तौहीद उलुहियत'' ही आहे की, ही सर्व कामे फक्त आणि फक्त अल्लाहतआलासाठीच केली जावी. कबरपूजेच्या रोगात मग्न असलेले सर्वसाधारण लोक, व खासलोक याच तौहिद उलुहियतच्या दृष्टिकोनातून शिर्क करीत आहेत. वर वर्णन केलेल्या उपासनेचे अनेक प्रकार, ते या कबरीत दफन केलेल्या, आणि मरण पावलेले बुजूर्ग लोक यांच्यासाठी सुद्धा करतात.

(३) ''तौहीद सिफात'' (गुण संज्ञा) याचा अर्थ असा की अल्लाहतआलाची जी गुणवैशिष्ट्ये कुरआन व

हदीशीत वर्णन केली गेली आहेत, त्यांना कुठल्याही कमी बेशी शिवाय मान्य करणे आणि अशी गुणवैशिष्टये अल्लाहला सोडून दुसऱ्या कोणासाठी मान्य न करणे. उदा. त्याचे एक गुणवैशिष्टये, अदृश्याचा ज्ञाता आहे. किंवा दूरच्या किंवा जवळच्या प्रत्येकाची याचना ऐकून घेण्यास सक्षम आहे. या ब्रम्हांडात हर प्रकारचा हेरफेर करण्याचा ज्याला पूर्ण अधिकार आहे. या शिवाय आणखी गुणवैशिष्टये नेहमीकरीता, यापैकी एखादे गुणवैशिष्टय, अल्लाहतआलाला सोडून कोण्या नबी, वली किंवा कुठल्याही व्यक्तीत मान्य केली जाऊ नयेत. जर मान्य केली गेली तर हे ''शिर्क'' होईल. दुःखाने म्हणावे लागते की कबरींची पुजा करणाऱ्यांमध्ये हे शिर्क सर्वसाधारणपणे पहावयास मिळते. त्यांनी वर वर्णन केलेल्या अल्लाहच्या गुणवैशिष्ट्यांत पुष्कळशा बंद्यांना शामिल करून ठेवले आहे. (अल्लाह आम्हाला त्यांच्यापैकी न करो. आमीन)

१०) 'हिदायत' ची अनेक स्पष्टीकरणे आहेत. सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करणे, सरळ मार्गावर चालविणे, उद्दिष्ट प्राप्तीकडे पोहोच करणे याला अरबी भाषेत 'इरशाद', 'तौफिक',' इलहाम' आणि 'दलालत' या शब्दांनी संबोधले जाते. म्हणजे आम्हाला सरळ मार्गाकडे जाण्यास मार्गदर्शन कर, सरळ मार्गावर चालण्याची तौफिक आणि त्यावर कायम स्वरूपी राहण्याची कृपा कर. जेणेकरून आम्हाला तुझी मर्जी (उद्दिष्टे प्राप्ती) हस्तगत व्हावी. हा सरळ मार्ग केवळ ज्ञान आणि बुद्धीने हस्तगत होऊ शकत नाही. हा सरळ मार्ग म्हणजे तोच ''अलइस्लाम'' आहे. ज्यास पैगंबर ﷺ नी जगापुढे सादर केला आणि आता जे कुरआन व सही हदीसीत नमूद आहेत.

११) हा सरळ मार्गाचा खुलासा (स्पष्टीकरण) आहे की, हा सरळ मार्ग तो आहे, ज्यावर ते लोक चालले, ज्यावर तुझे बक्षीस झाले. हा तो अंबिया, हुतात्मे, सत्यवादी पुण्यवानांचा पुरस्कृत समूह आहे. जसे की, सू. निसा मध्ये आलेले आहेत, ''आणि जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांच्या आदेशांवर अंमलबजावणी करतात ते (निर्णयाच्या दिवशी) अशा लोकांबरोबर असतील, ज्यांना अल्लाहने ईनाम दिले आहे. म्हणजे अंबिया, सत्यवादी, हुतात्मे, आणि सदाचरणी लोक. आणि या लोकांची संगत खूप उत्कृष्ट आहे.'' (सू.निसा-६९) या महावाक्यात हे पण स्पष्ट करण्यात आले आहे की, ईनाम प्राप्त करणाऱ्यांचा हा मार्ग अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालनाचा मार्ग असून दुसरा कोणताही मार्ग नाही.

१२) काही रिवायतीनुसार स्पष्ट होते की, मगज़ुबे अलैहीम (ज्यांच्यावर अल्लाहचा प्रकोप झाला) ने अभिप्रेत यहूदी, आणि ज़ाल्लीन (अन्याय करणारे, गुमराहो) ने अभिप्रेत ख्रिश्चन होय. इब्ने अबी हातिम رضي الله عنه म्हणतात की, भाष्यकारांमध्ये यात मतभेद नाहीत. म्हणून सरळ मार्गावर चालण्याची इच्छा बाळगणाऱ्यांसाठी आवश्यक आहे की, त्यांनी यहूदी आणि ख्रिश्चन दोहोंच्या फसवेगिरीपासून सावध राहावे. यहूदींची मोठी गुमराही (सरळ मार्गावरून भटकणे) ही होती की ते जाणून बुजून सरळ मार्गावर चालत नव्हते. अल्लाहच्या महावाक्यांत हेरफेर करत व बहानेबाजीपासून स्वत:ला वाचवत नसत. हजरत उजैर عليه السلام ला त्यांनी अल्लाहचा पूत्र म्हटले व आपल्या धर्मपंडितांना हराम हलाल ठरवण्याचा अधिकार आहे, असे ते मानत असत. ख्रिश्चनांची सर्वात मोठी चूक ही होती की त्यांनी हजरत ईसा عليه السلام ला त्यांच्या मर्यादेपेक्षा जास्त उंचावर नेऊन ठेवले. त्यांनी ह.ईसा عليه السلام ला अल्लाहचा पुत्र आणि तीन अल्लाहपैकी तिसरा खुदा मानले. आश्चर्य आहे की, उम्मते मोहम्मदीया (महंमद ﷺ पैगंबराचे अनुयायी) मध्ये देखील अतिशयोक्ती व प्रमाणापेक्षा अधिक महत्त्व देणे ह्या गुमराही फार आहेत. आणि यामुळेच ते या जगांत अपमानित व पीडित आहेत. अल्लाहतआला या उम्मतला गुमराहीच्या खड्ड्यातून बाहेर काढो. (आमीन)

सू.फातेहा च्या शेवटी ''आमीन'' म्हणण्याला मोहम्मद पैगंबर ﷺ नी विशेष जोर देऊन त्याचे महात्म्य वर्णन केले आहे. म्हणून इमाम आणि इमामच्या पाठीमागील नमाज पठण करणारे या सर्वांनी ''आमीन'' म्हटले पाहिजे. मोहम्मद पैगंबर ﷺ आणि सहाबा رضي الله عنهم जहरी नमाजीत मोठ्याने ''आमीन'' म्हणत असत. येथपावेतो की, मशिदीत आवाज निनादून जाई. (सुनन इब्ने माजा किताबुस्सलात, सुनन अबु दाऊद, सही बुखारी) म्हणून ''आमीन'' मोठया आवाजात म्हणणे सुन्नत आणि सहाबा رضي الله عنهم चा नित्यनियम आहे. ''आमीन'' चे विविध अर्थ दर्शविण्यात आले आहे.

१) याचप्रमाणे असो. २) आम्हाला निष्फळ न करो. ३) हे अल्लाह आमची प्रार्थना स्वीकार कर.

महावाक्ये २८६

# (२) सू. बकर: [१]

रुकूअ ४०

اٰیاتها ٢٨٦ | (٢) سُوْرَةُ الْبَقَرَةِ مَدَنِيَّةٌ | رکوعاتها ٤٠

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

الٓمّٓ ۝١

**अलिफ –लाम–मीम[२] ①**

ذٰلِكَ الْكِتٰبُ لَا رَيْبَ ۛ فِيْهِ ۛ هُدًى لِّلْمُتَّقِيْنَ ۝٢

**ह्या पुस्तकात (अल्लाहचे पुस्तक होण्यात) कसलाच संशय[३] नाही. ते (अल्लाहला) भिणाऱ्या लोकांसाठी रस्ता दाखवणारे[४] आहे. ②**

الَّذِيْنَ يُؤْمِنُوْنَ بِالْغَيْبِ وَ يُقِيْمُوْنَ الصَّلٰوةَ وَ مِمَّا رَزَقْنٰهُمْ يُنْفِقُوْنَ ۝٣

**जे लोक परोक्ष गोष्टींवर ईमान आणतात आणि नित्य नमाज पठण करतात[६] आणि आम्ही दिलेल्या उपजीविकेतून (अल्लाहच्या मार्गात) खर्च[७] करतात. ③**

وَ الَّذِيْنَ يُؤْمِنُوْنَ بِمَآ اُنْزِلَ اِلَيْكَ وَ مَآ اُنْزِلَ مِنْ قَبْلِكَ ۚ وَ بِالْاٰخِرَةِ هُمْ يُوْقِنُوْنَ ۝٤

**आणि जे लोक ईमान आणतात त्यावर जे (पुस्तक) आपल्यावर अवतरीत झाले आहे, (म्हणजे कुरआन) आणि जी (पुस्तके) आपल्यापूर्वी अवतरीत झाली[८] आहेत, आणि परलोकाची पण पूर्ण खात्री बाळगतात. ④**

اُولٰٓئِكَ عَلٰى هُدًى مِّنْ رَّبِّهِمْ ۗ وَ اُولٰٓئِكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ۝٥

**असेच लोक आपल्या पालनकर्त्याच्या सरळ मार्गावर आहेत, आणि हेच लोक साफल्य आणि मुक्ती मिळवणारे आहेत[९]. ⑤**

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا سَوَآءٌ عَلَيْهِمْ ءَاَنْذَرْتَهُمْ اَمْ لَمْ تُنْذِرْهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ۝٦

**नि:संशय काफिरांना आपले भिवविणे अथवा न भिवविणे बरोबर आहे. ते तर ईमान आणणारच नाही.[१०] ⑥**

خَتَمَ اللّٰهُ عَلٰى قُلُوْبِهِمْ وَ عَلٰى سَمْعِهِمْ ؕ وَ عَلٰٓى اَبْصَارِهِمْ غِشَاوَةٌ ؗ وَّ لَهُمْ عَذَابٌ عَظِيْمٌ ۝٧

**अल्लाहने त्यांच्या अंत:करणावर, कानांवर मोहोर लावली आहे. आणि त्यांच्या डोळ्यांवर पडदा पाडला आहे. आणि त्यांना (परलोकात) मोठी शिक्षा होणार आहे.[११] ⑦**

وَ مِنَ النَّاسِ مَنْ يَّقُوْلُ اٰمَنَّا بِاللّٰهِ وَ بِالْيَوْمِ الْاٰخِرِ وَ مَا هُمْ بِمُؤْمِنِيْنَ ۝٨

**आणि लोकात कुणीकुणी असे आहेत की, जे म्हणतात की, आम्ही अल्लाहवर आणि शेवटच्या दिवसावर विश्वास ठेवला आहे. परंतु खरे पाहता ते ईमानवाले नाहीत.[१२] ⑧**

१) या अध्यायांत पुढे गायीची गोष्ट वर्णन करण्यात आली आहे. म्हणून या अध्यायाला बक़र: (गाय) असे नांव दिले आहे. हदीसीमध्ये याचे महत्त्व असे आले आहे की, ज्या घरात हा अध्याय वाचला जातो, त्या घरातून शैतान पळून जातो. (इब्ने कसीर, स. मुस्लीम) अवतरीत होण्याच्या दृष्टीने हा अध्याय मदनी काळाच्या सुरवातीला अवतरीत झाला आहे. तथापि याची काही महावाक्ये हज्जतुलविदाच्या वेळी अवतरीत झाली आहेत. काही धर्मपंडीतांच्या मते या अध्यायात एक हजार (१०००) आदेश आणि एक हजार सूचना, (१०००) आणि एक हजार अशा गोष्टी आहेत, ज्यांचे करणे धर्मशास्त्रानुसार निशिद्ध आहे. (इब्ने कसीर)

२) यांना मुकत्तआत अक्षरे म्हटले जाते. म्हणजे वेगवेगळी वाचली जाणारी अक्षरे. यांच्या अर्थाबाबत काही ठोस प्रमाण नाही. अल्लाह बेहतर जाणणारा आहे. अलबत्ता हुजूर करीम ﷺ च्या कथनानुसार, ''मी असे सांगत नाही की अलीफ, लाम, मीम एक अक्षर आहे. परंतु अलीफ एक अक्षर लाम एक अक्षर व मीम एक अक्षर आहे. आणि प्रत्येक अक्षरासाठी एक पुण्य. आणि एक पुण्याचे प्रतिफळ दहापट आहे.'' (तिरमिझी, हाकिम)

३) याच्या अल्लाहकडून अवतरीत होण्यात काही शंका नाही. जसे दुसरे एका ठिकाणी सांगितले आहे की, ''नि:संशय सर्व जगाच्या पालनकर्त्याकडून हे पुस्तक अवतरीत झाले आहे.'' (अलीफ लाम मीम सजदा २) काही धर्मपंडीतांनी सांगितले आहे की, यात आदेश नकारात्मक आहे. म्हणजे याच्यात शंका घेऊ नका या शिवाय यात ज्या घटनांचे वर्णन केले गेलेले आहे, त्याच्या सत्यतेत (धर्माचे) आदेश आणि तत्त्व यांचे वर्णन केले गेले आहे. ज्यांच्याशी मानवतेचे, साफल्य आणि मुक्ती निगडीत आहे. आणि ज्या श्रद्धा (एकेश्वरवाद, पैगंबरी व (पुनरुत्थान) कयामत) यांच्याबाबतीत वर्णन केलेले आहे. त्याच्या सत्य असण्यात काहीही संशय नाही.

४) तसे पहाता हे अल्लाहचे पुस्तक पथदर्शन किंवा मार्गदर्शनासाठी अवतरीत झाले आहे. परंतु या भलाईच्या (झुळझुळ वाहणाऱ्या) झऱ्यातून त्याच लोकांना तृप्ती मिळेल, जे अमृताची प्राप्ती करण्याची इच्छा आणि ईशभय बाळगतात. ज्यांच्या मनात मृत्यूनंतर, अल्लाहच्या दरबारात उभे राहून, उत्तर देण्याची जाणीव आणि त्याची

काळजीच नाही. त्यांच्यात मार्गदर्शनाची अभिलाषा, व आडमार्गी भटकण्यापासून वाचण्याचा ध्यास असणार नाही. तर त्याला हिदायत, मार्गदर्शन कोठून आणि कसे प्राप्त होणार?

५) परोक्षाच्या गोष्टीने त्या गोष्टी अभिप्रेत आहेत, ज्यांना बुद्धी व जाणीवेने माहित करून घेणे शक्य नाही. उदा. अल्लाहचे अस्तित्व, वह्यचे प्रकटीकरण, स्वर्ग,नर्क, देवदूत, कबरीत होणाऱ्या यातना, पुष्कळशा शरीरांचे कयामतच्या दिवशी होणारे उत्थापन वगैरे, यामुळे माहित झाले की, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने सांगितलेल्या अशा गोष्टी ज्या बुद्धी आणि जाणिवेने जाणता येत नाही, वर विश्वास ठेवणे हे ईमानचे मुख्य अंग आहे. आणि या गोष्टींना नाकारणे, नास्तिक्य आणि पथभ्रष्टता (आडमार्गी भटकणे) आहे.

६) नमाजीचा कायम करण्याचा अर्थ असा की, नित्य नियमाने, नमाजचे पठण करणे. आणि नबी करीम ﷺ जशी नमाज पढत असत, तशीच नमाज पढणे. एरवी दांभिक लोक सुद्धा नमाज पढत होते.

७) ''इन फाक'' चा अर्थ अल्लाहसाठी खर्च करणे, यात अनिवार्य जकात आणि ऐच्छिक दानधर्मपण आला. विश्वासू लोक, आपल्या कुवतीप्रमाणे या दोन्ही गोष्टीत हयगय करीत नसत. किंबहुना, आई-बाप आणि आपल्या मुलाबाळावंर योग्य मार्गाने खर्च करणे, हे सुद्धा इनफाक मध्ये शामील आहे, आणि पुण्याचे काम व त्याचा मोबदला परलोकी मिळणारा आहे.

८) मागील पुस्तकावर ईमान आणण्याचा अर्थ असा की, जी पुस्तके पैगंबर عليه السلام लोकांवर अवतरीत झाली आहेत, ती सर्व सत्य आहेत. ती मागील पुस्तके सध्या आपल्या मूळ अवस्थेत असित्वात नाही. महणून त्या पुस्तकांवर अंमलबजावणी केली जाऊ शकत नाही. अंमलबजावणी फक्त कुरआन आणि हदीस यावरच केली जाईल. यामुळे हे ही ठाऊक झाले की, वह्य आणि पैगंबरी यांचा क्रम (सिलसिला) हुजूर ﷺ वर पूर्ण झाला आहे. नाहीतर (आणखी कुणी पैगंबर येणार असता तर) त्यावरपण ईमान आणण्याचा उल्लेख अल्लाहतआलाने जरूर केला असता.

९) या ठिकाणी, ज्या लोकांनी विश्वास ठेवला, त्यांच्या परिणामाचे वर्णन केले आहे. जे ईमान आणल्यानंतर,ईशभय, कर्म व खऱ्या श्रद्धेवर कार्यरत राहतात. केवळ तोंडी बोलून, आपल्या ईमानाच्या प्रकटीकरणाला ते पर्याप्त समजत नाही. साफल्याचा अर्थ परलोकात, ईशप्रसन्नता, त्याची दया व क्षमा प्राप्त होणे होय. या बरोबरच, या इहलोकात पण, सुख समृद्धी, पुण्यशिलता आणि साफल्य मिळाले तर काय वर्णावे? (सुबहान अल्लाह !) परंतु खरे साफल्य परलोकातील साफल्य आहे. यानंतर अल्लाहतआला दुसऱ्या समूहाचे वर्णन करीतो. जो फक्त नास्तिकच नाही, तर त्याची नास्तिकता व अहंमन्यता, इतक्या थराला पोहचली आहे की, त्याच्याकडून भलाई व इस्लाम, कबूल करण्याची अजिबात शाश्वती नाही.

१०) नबी करीम ﷺ ची खुपच इच्छा होती की सर्वांनी मुसलमान होऊन जावे, आणि याचसाठी नबी करीम ﷺ प्रयत्नशील होते. परंतु अल्लाहतआलाने फर्माविले की, ईमान आणणे त्यांच्या नशिबीच नाही,हे ते काही विशिष्ट लोक होते. ज्यांच्या हृदयावर मोहर लावली गेली होती. (जसे अबुजहल,अबुलहब वगैरे) तथापि आपल्या प्रचाराने बरेच लोक मुसलमान (विश्वासू) झाले होते. इथपर्यंत की पूर्ण अरबखंड मुसलमान झाले.

११) या ठिकाणी त्यांच्या ईमान न आणण्याच्या कारणांनी कार्यमिमांसा केली जात आहे की, सतत इन्कार आणि पापकर्मात लिप्त राहण्याच्या वृत्तीने, त्यांच्या अंतःकरणाची सत्याला कबूल करण्याची क्षमता, समाप्त झालेली आहे. त्यांचे कान सत्य गोष्ट ऐकूण घेण्यास तयार नाहीत आणि त्यांची दृष्टी या ब्रम्हांडात त्यांच्या पालनकर्त्यांच्या निरनिराळ्या ज्या निशाण्या पसरवून ठेवण्यात आल्या आहेत, त्यांच्या पाहण्यापासून वंचित आहे. तर ते ईमान कशाप्रकारे आणतील? ईमान तर तेच लोक आणतात, जे अल्लाहतआलाने जी क्षमता त्यांना दिली आहे, तिचा खराखरा उपयोग करतात. त्या निशाण्यापासून बोध घेतात. याच्या उलट काही लोक, या हदीसीप्रमाणे आहेत, ''विश्वासू जेव्हा एखादे पाप करून बसतो, तर त्याच्या हृदयावर एक काळा बिंदू अंकीत होतो, जर तो पश्चात्ताप व्यक्त करून त्या पापापासून मुक्त होतो, तर त्याचे हृदय पूर्वीसारखे स्वच्छ आणि साफ होऊन जाते. परंतु जर तो पश्चात्ताप करण्याऐवजी, पापांवर पापच करीत जाईन, तर तो बिंदू (काळा) पसरून त्यांच्या संपूर्ण हृदयावर आच्छादीत होऊन जातो.'' नबी ﷺ नी म्हटले आहे, ''हाच तो गंज आहे. ज्याला अल्लाहतआलाने वर्णन केले आहे.'' ''त्यांच्या पापकर्मामुळे त्यांच्या हृदयाला गंज लागलेला आहे.'' (सू. अलमुतफ्फेफीन-१४) (तबरी, फतहुल कदीर) या परिस्थितीला कुरआनाने ''खतम'' (मोहर लागून जाणे) म्हटले आहे. हा त्यांच्या सतत कुकर्मात लिप्त राहण्याचा परिणाम आहे.

१२) येथून तिसरा समूह दांभिक लोकांची चर्चा सुरू होत आहे. ज्यांची हृदये ईमान आणण्यापासून वंचित होती, परंतु ते विश्वासू लोकांना फसवण्यासाठी आपल्या जिव्हेने, ईमानाचे प्रदर्शन करीत असत. अल्लाहतआलाने म्हटले आहे, ते दांभिक लोक अल्लाहतआलाला धोका देण्यात यशस्वी होऊ शकत नाही. कारण अल्लाहतआला सर्व काही जाणतो. आणि विश्वासूंना पण सतत धोक्यात ठेऊ शकत नाही. कारण अल्लाहतआला वह्याद्वारे मुस्लिमांना या धोकेबाजांपासून सावध करून देत होता. अशाप्रकारे या धोकेबाजीने सर्व नुकसान त्यांचे स्वतःचेच होत होते की त्यांनी आपले पारलौकीक जीवन उदध्वस्त करून घेतले, आणि इहलोकात पण फट्फजीत झालेत.

يُخٰدِعُوْنَ اللّٰهَ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا ۚ وَمَا يَخْدَعُوْنَ اِلَّآ اَنْفُسَهُمْ وَمَا يَشْعُرُوْنَ ۝٩

**ते अल्लाहला आणि विश्वासू लोकांना धोका देत आहेत. परंतु वास्तविक ते स्वत:लाच धोका देत आहेत आणि त्यांना हे कळत नाही. ⑨**

فِىْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ ۙ فَزَادَهُمُ اللّٰهُ مَرَضًا ۚ وَلَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ۢ بِمَا كَانُوْا يَكْذِبُوْنَ ۝١٠

**त्यांच्या मनात (अविश्वासाचा) रोग (आधीच) होता. अल्लाहतआलाने (कुरआन अवतरित करून) तो रोग आणखी वाढविला.[१] आणि त्यांच्या खोटे बोलण्यामुळे, त्यांना यातनामय शिक्षा होणे आहे. ⑩**

وَاِذَا قِيْلَ لَهُمْ لَا تُفْسِدُوْا فِى الْاَرْضِ ۙ قَالُوْٓا اِنَّمَا نَحْنُ مُصْلِحُوْنَ ۝١١

**आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, पृथ्वीवर फसाद (अनाचार) फैलाऊ नका. तेव्हां ते उत्तर देतात की, आम्ही तर फक्त सुधारणा घडवून आणणारे आहोत ⑪**

اَلَآ اِنَّهُمْ هُمُ الْمُفْسِدُوْنَ وَلٰكِنْ لَّا يَشْعُرُوْنَ ۝١٢

**खबरदार! खचितच हेच लोक अनाचार करणारे आहेत.[२] पण हे त्यांना कळून येत नाही. ⑫**

وَاِذَا قِيْلَ لَهُمْ اٰمِنُوْا كَمَآ اٰمَنَ النَّاسُ قَالُوْٓا اَنُؤْمِنُ كَمَآ اٰمَنَ السُّفَهَآءُ ۭ اَلَآ اِنَّهُمْ هُمُ السُّفَهَآءُ وَلٰكِنْ لَّا يَعْلَمُوْنَ ۝١٣

**आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की आणखी लोक (सहाबा रजि.) च्या प्रमाणे तुम्हीही ईमान आणा. तेव्हा ते म्हणू लागतात की (इतर) मूर्खांनी जसे ईमान आणले, तसा आम्ही पण धरावा काय[३]? खबरदार खचितच ते स्वत:च मूर्ख आहेत, पण त्या गोष्टीची त्यांना जाणीवच होत नाही.[४] ⑬**

وَاِذَا لَقُوا الَّذِيْنَ اٰمَنُوْا قَالُوْٓا اٰمَنَّا ۚ وَاِذَا خَلَوْا اِلٰى شَيٰطِيْنِهِمْ ۙ قَالُوْٓا اِنَّا مَعَكُمْ ۙ اِنَّمَا نَحْنُ مُسْتَهْزِءُوْنَ ۝١٤

**आणि ज्यांनी ईमान आणले आहे. त्यांना जेव्हा हे भेटतात, तेव्हा म्हणतात की, आम्हीही ईमान आणले आहे. आणि जेव्हा एकांतात आपल्या पुढाऱ्याला भेटतात[५] तेव्हा त्यांना सांगतात आम्ही तुम्हासोबतच आहोत. आम्ही ज्यांनी ईमान आणले आहे, त्यांची चेष्टा करीत आहोत ⑭**

(१) रोगाचा अर्थ इन्कार व ढांभिकतेचा रोग आहे. त्यांच्यात सुधारणा केली नाही तर, हा रोग वाढतच जातो. या नुसार खोटे बोलणे ही ढांभिकतेची निशानी आहे. ज्याच्यापासून स्वत:ला वाचविले पाहिजे.

(२)फसाद (अनाचार), सुधारणाच्या विरूद्ध अर्थी आहे. इन्कार करण्याने व पाप प्रवृत्तीने पृथ्वीवर अनाचार (फसाद) माजतो. आणि अल्लाहच्या आज्ञापालनाने, सुख व शांती मिळते. प्रत्येक काळात, ढांभिक लोकांचे असेच वागणे राहिले आहे की, ते अनाचार माजवतात, ज्या गोष्टी करण्यायोग्य नाहीत त्या करतात (जाहीर करतात) आणि अल्लाहतआलाच्या बांधीव मर्यादांचे उल्लंघन करतात आणि याउपर ते दावा करतात की, ते सुधारणा आणि प्रगतीसाठी प्रयत्नशील आहेत.

(३) या ढांभिक लोकांनी नबी ﷺ च्या साथीदारांना (सहाबा ﵃) मूर्ख म्हटले, ज्यांनी अल्लाहच्या मार्गात तन,मन,धनाचे त्याग, करताना कुठलाही मागचा पुढचा विचार केला नाही, आणि आजचे ढांभिक लोक सांगतात की, सहाबा ﵃ ईमानाच्या दौलतीपासून वंचित होते. अल्लाहतआलाने पूर्वीच्या आणि आताच्या दोन्ही ढांभिक लोकांचे म्हणणे रद्द केले आहे. अल्लाहतआलाने म्हटले, कुण्या उच्चतम उद्देशाने ऐहिक स्वार्थाचा त्याग करणे, मूर्खपणा नाही, पण चांगले शहाणपण व खुशनसीबी आहे. सहाबा ﵃ नी या खुशनशिबीचा पुरावा दिला आहे. म्हणून ते पक्के विश्वासूच नाही, तर ते विश्वासासाठी एक प्रमाण आणि कसोटी आहेत. आता ईमान त्यांचे श्रेष्ठ असेल जे सहाबा ﵃ प्रमाणे ईमान आणतील. ''मग तुम्ही जसा विश्वास धरला आहे, त्याचप्रमाणे हे लोक विश्वास धरतील तर तेही सरळ मार्गी लागतील.'' (सू.बकर: आ.१३७)

(४) क्षणिक मिळणाऱ्या फायद्यासाठी, उशिराने मिळणाऱ्या फायद्याला दृष्टीआड करणे म्हणजे परलोकातील, हमेशा आणि कायम राहणाऱ्या जीवनाच्या मुकाबल्यात, या इहलोकातील (क्षणभंगुर) आणि नष्ट होणाऱ्या जीवनाला श्रेष्ठत्व देणे. आणि अल्लाहशिवाय लोकांना भिणे, अव्वल दर्जाची मूर्खता आहे. ज्याचा अंगीकार या ढांभिक लोकांनी केला. आणि अशाप्रकारे अशा खऱ्या हकीकती पासून आज्ञानात राहिले.

(५) शैतानाने अभिप्रेत कुरैशचे मोठे मोठे सरदार आणि यहूदी होत. ज्यांच्या बहकविण्यावर ते इस्लाम आणि मुस्लीमांच्या विरोधात कट कारस्थाने करीत असत. किंवा ढांभिक लोकांचे सरदार पण अभिप्रेत आहेत.

ٱللَّهُ يَسْتَهْزِئُ بِهِمْ وَيَمُدُّهُمْ فِى طُغْيَٰنِهِمْ يَعْمَهُونَ ﴿١٥﴾

**अल्लाहतआला सुद्धा त्यांच्याशी चेष्टा(१) करतो, आणि (म्हणूनच) त्यांच्या शिरजोरीत वाढ करून देतो, (की ज्यामुळे ते आपल्या शिरजोरीत भटकत राहतात) १५**

أُو۟لَٰٓئِكَ ٱلَّذِينَ ٱشْتَرَوُا۟ ٱلضَّلَٰلَةَ بِٱلْهُدَىٰ فَمَا رَبِحَت تِّجَٰرَتُهُمْ وَمَا كَانُوا۟ مُهْتَدِينَ ﴿١٦﴾

**हे ते लोक आहेत, ज्यांनी सरळ मार्गाच्या ऐवजी चुकीचा मार्ग विकत घेतला. पण त्यांचा व्यापार(२) ही लाभदायक झाला नाही. आणि ते सरळ मार्गावर पण कायम राहिले नाहीत.१६**

مَثَلُهُمْ كَمَثَلِ ٱلَّذِى ٱسْتَوْقَدَ نَارًا فَلَمَّآ أَضَآءَتْ مَا حَوْلَهُۥ ذَهَبَ ٱللَّهُ بِنُورِهِمْ وَتَرَكَهُمْ فِى ظُلُمَٰتٍ لَّا يُبْصِرُونَ ﴿١٧﴾

**यांची उपमा अशा माणसासारखी आहे, ज्याने अग्नी पेटवला, त्यामुळे त्यांच्या आजूबाजूच्या गोष्टी प्रकाशात आल्याच होत्या की, अल्लाहने त्यांच्या डोळ्यांचे तेज हिरावून घेतले आणि त्यांना अंधारात सोडून दिले जे पाहात नाहीत(३) १७**

صُمٌّۢ بُكْمٌ عُمْىٌ فَهُمْ لَا يَرْجِعُونَ ﴿١٨﴾

**बहिरे, मुके, आंधळे आहेत. ते (सरळ मार्गावर) कधीच परतणार नाही १८**

أَوْ كَصَيِّبٍ مِّنَ ٱلسَّمَآءِ فِيهِ ظُلُمَٰتٌ وَرَعْدٌ وَبَرْقٌ يَجْعَلُونَ أَصَٰبِعَهُمْ فِىٓ ءَاذَانِهِم مِّنَ ٱلصَّوَٰعِقِ حَذَرَ ٱلْمَوْتِ ۚ وَٱللَّهُ مُحِيطٌۢ بِٱلْكَٰفِرِينَ ﴿١٩﴾

**किंवा त्यांची स्थिती आकाशातून पडणाऱ्या पावसासारखी आहे. ज्यात अंधकार, मेघगर्जना आणि वीज असतात. विजेच्या कडाक्याने मरण्याच्या भीतीने ते आपली बोटे आपल्या कानात ठोसून घेतात. आणि अल्लाहतआला नास्तिकांना घेरून आहे.१९**

(१) अल्लाहतआला पण त्यांच्याशी थट्टा,मस्करी करतो. याचा एक अर्थ असा आहे की, ते ज्याप्रमाणे मुस्लीमांबरोबर थट्टा, मस्करी करीत आहेत, अल्लाहतआला पण त्यांच्याशी असाच मामला करून, त्यांना अप्रतिष्ठित व अपमानित करतो, याला थट्टा मस्करी म्हणणे ही भाषेची एक पद्धत आहे. परंतु वस्तुत: थट्टा मस्करी नाही, त्यांच्या थट्टा मस्करींच्या कामाची शिक्षा आहे. 'वाईटाचा बदला त्याच प्रकारच्या वाईटाने आहे.' (सू.शूरा) यात वाईटाच्या बदल्याला वाईट म्हटले गेले आहे. वास्तविक तो वाईटपणा नाही, परंतु एक योग्य काम आहे. त्याचप्रमाणे '' युखादे ऊन्नल्लाहा वहो व खादे अुहुम व मकरू व मकरल्लाह''(जे अल्लाहला धोका देतात अल्लाह त्यांना धोका देणार आहे, त्यांनी जी पद्धत अवलंबीली, अल्लाहनेही त्याच पद्धतीचा अवलंब केला) वगैरे महावाक्यात आहे. दुसरा अर्थ असा की कयामतच्या दिवशी अल्लाह पण त्यांच्याशी थट्टामस्करी करेल जसे सू. हदीद मध्ये ''यौमा यकुलुल मुनाफिकून'' स्पष्टीकरण आलेले आहे.

(२) या ठिकाणी व्यापाराचा अर्थ सरळ मार्ग सोडून आडमार्ग भटकणे होय, जो स्पष्टरित्या, तोट्याचा सौदा आहे. दांभिक लोकांनी याच दांभिकतेचा आश्रय घेऊन, हाच तोट्याचा व्यापार केला आहे. परंतु हा तोटा, परलोकात होणारा तोटा आहे. हे जरूरी नाही की, या इहलोकात त्यांना या तोट्याची जाणीव होईल. परंतु या दांभिक वृत्तीने या जगात त्यांना जे क्षणिक फायदे मिळत होते, त्यावर ते फार खुशीत येत होते. आणि याच्यामुळे आपल्या स्वत:ला फार हुशार व शहाणे समजत होते. आणि मुस्लीमांना अक्कल शून्य व मूर्ख समजत होते.

(३) ह.अब्दुल्लाह बिन मसऊद ﷺ आणि इतर सहाबा ﷺ नी याचा असा अर्थ काढला आहे की, जेव्हा नबी ﷺ मदीनेत आले, तेव्हा काही लोक मुसलमान होऊन गेले. परंतु लवकरच दांभिक (मुनाफिक) होऊन गेले. यांचे उदा. असे आहे की, एक माणूस अंधारात होता त्याने अग्नी (रोशनी) पेटविला त्यामुळे त्याचे आजूबाजूचे वातावरण प्रकाशित झाले. आणि फायदेकारक आणि नुकसानकारक वस्तू त्याचेवर स्पष्ट झाल्यात. अचानक तो अग्नी विझला, आणि तो माणूस पूर्वी सारखाच अंधकारात घेरला गेला, ही स्थिती दांभिक लोकांची पण होती. पूर्वी ते शिर्कच्या (बहुदेववादाच्या) अंधकारात होते. मुसलमान झाले, तर प्रकाशात येऊन लागले. विहीत,निषीद्ध,भलेबुरे ओळखू लागले, परत दुसऱ्यांदा ते इनकार आणि दांभिकतेकडे वळले, तर सारा प्रकाश जात राहिला. वसवश्यांच्या आहारी गेला आणि सत्य (इस्लाम) स्वीकारण्यापासून वंचित राहिला आहे.

يَكَادُ الْبَرْقُ يَخْطَفُ أَبْصَارَهُمْ ۖ كُلَّمَا أَضَاءَ لَهُم مَّشَوْا
فِيهِ وَإِذَا أَظْلَمَ عَلَيْهِمْ قَامُوا ۚ وَلَوْ شَاءَ اللَّهُ لَذَهَبَ
بِسَمْعِهِمْ وَأَبْصَارِهِمْ ۚ إِنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٢٠﴾

**जवळच आहे की, वीज यांची दृष्टी हिरावून नेईल, जेव्हा जेव्हा वीज चमकली तिच्या प्रकाशात ते चालले आणि जेव्हा यांचेवर अंधकार पसरतो, तेव्हा ते उभे राहतात[१] आणि जर अल्लाहतआला इच्छिता तर त्यांची श्रवणशक्ती आणि दृष्टी हिरावून[२] घेईन. काही संशय नाही की अल्लाहतआला सर्व वस्तुंवर सामर्थ्यवान आहे.(२०)**

يَا أَيُّهَا النَّاسُ اعْبُدُوا رَبَّكُمُ الَّذِي خَلَقَكُمْ وَالَّذِينَ
مِن قَبْلِكُمْ لَعَلَّكُمْ تَتَّقُونَ ﴿٢١﴾

**अहो लोकांनो! तुम्ही आपल्या त्या पालन कर्त्याची भक्ती करा, ज्याने तुम्हास व तुमच्यापूर्वीच्या लोकांना निर्माण केले. जेणेकरून तुम्ही परहेजगार होऊन जावे(२१)**

الَّذِي جَعَلَ لَكُمُ الْأَرْضَ فِرَاشًا وَالسَّمَاءَ بِنَاءً وَأَنزَلَ
مِنَ السَّمَاءِ مَاءً فَأَخْرَجَ بِهِ مِنَ الثَّمَرَاتِ رِزْقًا لَّكُمْ ۖ
فَلَا تَجْعَلُوا لِلَّهِ أَندَادًا وَأَنتُمْ تَعْلَمُونَ ﴿٢٢﴾

**ज्याने तुमच्यासाठी जमिनीला बिछाईत व आकाशाला छत बनविले आणि पाण्याचा वर्षाव करून, त्यापासून फळे निर्माण करून तुम्हाला उपजिविका दिली, तर खबरदार ! जाणून बुझून तुम्ही अल्लाहचे जोडीदार ठरवू नका[३](२२)**

وَإِن كُنتُمْ فِي رَيْبٍ مِّمَّا نَزَّلْنَا عَلَىٰ عَبْدِنَا فَأْتُوا بِسُورَةٍ
مِّن مِّثْلِهِ وَادْعُوا شُهَدَاءَكُم مِّن دُونِ اللَّهِ إِن
كُنتُمْ صَادِقِينَ ﴿٢٣﴾

**आम्ही जे काही आपल्या भक्ता (सल्ल.) वर उतारले आहे, त्याबद्दल तुम्हाला संशय असेल आणि तुम्ही खरे असाल तर या सारखाच एक अध्याय तर रचून आणा आणि अल्लाह शिवाय आपल्या मदतगारांना पण बोलावून घ्या[४](२३)**

१) हा ढांभिक लोकांच्या दुसऱ्या समुदायाचा वृत्तांत आहे. ज्यांच्यावर कधी सत्य स्पष्ट होते आणि कधी या बाबतीत ते शंका कुशंकेत पडतात. त्यांची अंत:करणे शंका-कुशंकेमुळे, त्या पर्जन्य वृष्टीसारखी आहेत, जी अंधकारात (इनकार व ढांभिकत्व) पडते. मेघगर्जना आणि विजेच्या चमचमाटाने त्यांच्या मनात भीती निर्माण होते, इथपावेतो की भीतीमुळे ते आपली बोटे आपल्या कानात ठोसून घेतात. परंतु या युक्त्या भीती आणि दहशत त्यांना अल्लाहच्या पकडीपासून वाचवू शकणार नाही, कारण की ते अल्लाहच्या घेरण्यातून निघू शकत नाही. जेव्हा सत्याची किरणे त्यांच्यावर पडतात तर ते सत्याकडे वळतात. परंतु जेव्हा इस्लाम आणि मुस्लीमांवर संकटांचा काळ येतो, तेव्हा माना डोलवत, हैरान होऊन जातात. (इब्ने कसीर) ढांभिकांचा हा समूह शेवटच्या वेळेपर्यंत शंकाकुशंका आणि वसवश्यांच्या आहारी गेला आणि सत्य (इस्लाम) स्वीकारण्यापासून वंचित राहिला आहे.

२) यात अशी तंबी देण्यात आली आहे की, जर अल्लाह इच्छील, तर तुम्हास दिलेल्या क्षमता काढून घेईन. याकरता मानवांना अल्लाहच्या सामर्थ्यांकडून त्यांच्या आज्ञापालनात टाळून त्याच्या शिक्षे व पकडी पासून निर्भय होता कामा नये.

३) मार्गदर्शन आणि आडमार्गी भटकणाऱ्याच्या दृष्टीने अल्लाहने मानवांच्या तीन समूहांची चर्चा केल्यानंतर एकेश्वरवादाची आणि अल्लाहतआलाच्या उपासनेचे आमंत्रण, सर्व मनुष्य मात्रास दिले जात आहे. सांगितले की जेव्हा तुमच्या आणि साऱ्या ब्रम्हांडाचा निर्माता अल्लाह आहे. आणि तुमच्या आवश्यकतांना पूर्ण करणारा तोच आहे, तर मग तुम्ही त्याला सोडून इतरांची का उपासना करतात? दुसऱ्यांना त्याचा जोडीदार का ठरवता आणि तुम्ही अल्लाहच्या शिक्षेपासून स्वत:ला वाचवू इच्छितात, तर फक्त त्याचीच उपासना करा, जाणून बुजून शिर्कचे (बहुदेववादाचे) पाप करू नका.

४) एकेश्वरवादानंतर आता पैगंबरीचे पुरावे दिले जात आहे की, आम्ही आपल्या सेवकांवर जे पुस्तक अवतरीत केले आहे, ते अल्लाहकडून अवतरीत होण्यावर तुम्हाला शंका असेल तर आपल्या सर्व साथीदारांना बरोबर घेऊन याच्यासारखा एक अध्याय रचून दाखवा, आणि जर तुम्ही असे करू शकला नाही, तर तुम्हाला समजले पाहिजे, हे काम खरोखर कोण्या मानवाचा प्रयत्न नाही, हे तर अल्लाहकडूनच त्याची वाणी आहे. आणि आमच्यावर (म्हणजे अल्लाहवर) आणि पैगंबर मुहम्मद ﷺ वर ईमान आणून नरकाच्या अग्नीपासून वाचण्याचा प्रयत्न केला पाहिजे, जो नास्तिकांसाठी तयार केला गेला आहे.

فَإِن لَّمْ تَفْعَلُوا وَلَن تَفْعَلُوا فَاتَّقُوا النَّارَ الَّتِي وَقُودُهَا النَّاسُ وَالْحِجَارَةُ ۖ أُعِدَّتْ لِلْكَافِرِينَ ﴿٢٤﴾

**मग जर तुम्ही (एवढी गोष्ट) केली नाही आणि तुम्ही केव्हाही करू शकणार[१] नाही, तर (याला सत्य जाणून) त्या आगीपासून स्वत:ला वाचवा जिचे इंधन माणसे आणि दगड[२] आहे. जी काफिरांसाठी भडकवून तयार ठेवली आहे.[३]**(२४)

وَبَشِّرِ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ أَنَّ لَهُمْ جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۖ كُلَّمَا رُزِقُوا مِنْهَا مِن ثَمَرَةٍ رِّزْقًا ۙ قَالُوا هَٰذَا الَّذِي رُزِقْنَا مِن قَبْلُ ۖ وَأُتُوا بِهِ مُتَشَابِهًا ۖ وَلَهُمْ فِيهَا أَزْوَاجٌ مُّطَهَّرَةٌ ۖ وَهُمْ فِيهَا خَالِدُونَ ﴿٢٥﴾

**आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कामे केली, त्यांना त्या[४] स्वर्गाच्या बागांची खूषखबर दे, ज्यांच्या खालून नद्या वाहत असतील, जेव्हा त्यांना त्यांच्यातून एखादे फळ खाण्यास दिले जाईल तेव्हा ते म्हणतील, हे तेच आहे जे आम्हास पूर्वी दिले गेले होते[५]. आणि त्यांच्यासाठी चोख[६] आणि निर्मळ पत्न्या असतील आणि ते बागांत सदा सर्वदा राहतील.[७]**(२५)

(१) कुरआन सत्य असण्याचा आणखी एक पुरावा असा, की अरब आणि अरबेतर मधल्या सर्व काफिरांना आव्हान दिले गेले. परंतु आजतागायत त्याचे उत्तर देण्याला ते असमर्थ आहेत आणि आम्ही खात्रीने सांगतो की कयामतपर्यंत ते या गोष्टीला असमर्थ राहतील.

(२) ह. इब्ने अब्बास ﵄ च्या म्हणण्यानुसार दगड म्हणजे गंधकाचे दगड आणि काही लोकांच्या मते, दगड म्हणजे दगडांच्या मूर्ती. ज्या नरकाग्नीचे इंधन होतील, ज्यांची लोक या जगात पुजा करीत असत. जसे कुरआनात एका जागी म्हटले आहे, ''तुम्ही आणि तुम्ही ज्यांची पूजा अर्चा करीत होता ते नरकाग्नीचे इंधन होतील.'' (सू.अंबिया ९८)

(३) यावरून माहित झाले की, नरकाग्नी फक्त नास्तिक आणि बहुदेववाद्यांसाठी तयार करण्यात आला आहे आणि दुसरी गोष्ट ही माहित झाली की, स्वर्ग आणि नरकाचे अस्तित्व आहे, जे आजपण सिध्द आहे. पुण्यवान (सलफ सॉलेहीन) लोकांची यावर श्रद्धा आहे. या काल्पनिक गोष्टी नाही. जसे काही धर्मांड लोक आणि हदीसीला न मानणारे लोक म्हणतात.

(४) कुरआन करीमने प्रत्येक ठिकाणी, ईमानाबरोबर सत्कृत्याची चर्चा केली आहे. त्यामुळे हे स्पष्ट होते की, ईमान आणि सत्कृत्ये यांची एकत्र साठगांठ आहे. सत्कृत्याशिवाय ईमान फायदेकारक नाही. आणि ईमानाशिवाय भलाईच्या कृत्यांचे अल्लाहजवळ काही महत्त्व नाही. आणि सत्कृत्ये काय आहे? जी सत्कृत्ये हुजूर ﷺ च्या सुन्नतप्रमाणे आणि ईश प्रसन्नतेसाठी केली जावीत. हुजूर ﷺ च्या सुन्नतच्या उलट केलेल्या सत्कृत्यांना नाकबूल आणि लोकांच्या देखाव्यासाठी केलेली सुकर्मेपण फेटाळली जातील.

(५) ''मुतशाबेहन''चा अर्थ, एकतर स्वर्गातील सर्व फळे, एक दुसऱ्यांसारखी दिसत असतील, किंवा या जगातील फळांसारखी दिसत असतील. तरी सुद्धा हे समान दिसणे फक्त दिसण्यात आणि नावाच्या मर्यादेपर्यंतच राहील. नाहीतर स्वर्गातील फळांची मजा आणि चव या जगात मिळणाऱ्या मजा आणि चवीशी कधीच तुलना करता येणार नाही. स्वर्गात मिळणाऱ्या देणग्यासंबंधी हदीसीत वर्णन आहे की, ''कुण्या डोळ्यांनी त्यांना पाहिले नाही, आणि कुण्या कानांनी त्यांच्याबद्दल ऐकले नाही. (आणि ऐकणे व पाहणे ते काय?) कुण्या मनुष्याच्या मनात त्यांची कल्पना पण आली नाही.'' (स. बुखारी)

(६) म्हणजे मासिक धर्म, आणि प्रसुती नंतरच्या विटाळ आणि दुसऱ्या शारीरिक स्त्रावापासून त्या पाकसाफ असतील.

(७) ''खुलूद'' चा अर्थ नेहमीच्या वास्तव्याचा आहे. स्वर्गावाले नेहमीकरता स्वर्गात राहतील आणि आनंदात असतील आणि नरकाग्नीवाले नेहमीकरता नरकात राहतील, आणि शिक्षा भोगत असतील. हदीसीत आले आहे की, स्वर्गात आणि नरकात गेल्यानंतर एक देवदूत दवंडी पिटवील, हे नरकात जाणाऱ्यांनो! आता मृत्यू नाही. आणि हे स्वर्गात जाणाऱ्यांनो ! आता मृत्यू नाही. जी व्यक्ती ज्या अवस्थेत असेल, त्याच अवस्थेत नेहमीसाठी राहील. (स. बुखारी, स. मुस्लिम)

إِنَّ ٱللَّهَ لَا يَسْتَحْىِۦٓ أَن يَضْرِبَ مَثَلًا مَّا بَعُوضَةً فَمَا فَوْقَهَا ۚ فَأَمَّا ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ فَيَعْلَمُونَ أَنَّهُ ٱلْحَقُّ مِن رَّبِّهِمْ ۖ وَأَمَّا ٱلَّذِينَ كَفَرُوا۟ فَيَقُولُونَ مَاذَآ أَرَادَ ٱللَّهُ بِهَٰذَا مَثَلًا ۘ يُضِلُّ بِهِۦ كَثِيرًا وَيَهْدِى بِهِۦ كَثِيرًا ۚ وَمَا يُضِلُّ بِهِۦٓ إِلَّا ٱلْفَٰسِقِينَ ﴿٢٦﴾

**नि:संशय अल्लाह कोणताही दृष्टांत देण्यात भीड ठेवीत नाही. मग तो दृष्टांत एखादया चिलटाचा (मच्छर) असो वा यापेक्षा क्षुल्लक असो[१]. ईमानवाले लोक त्या दृष्टांताला आपल्या पालनकर्त्याकडून आणि अगदी योग्य समजतात. आणि जे काफिर आहेत, ते म्हणतात असा दृष्टांत देण्यात अल्लाहचा काय हेतू असावा? असल्याच दृष्टांताने, अल्लाहतआला कित्येकांना आडमार्गी भटकवितो आणि कित्येकांना सरळ मार्गावर आणतो[२] आणि आडमार्गी त्यांनाच भटकवितो जे आज्ञाभंजक आहेत ㉖**

ٱلَّذِينَ يَنقُضُونَ عَهْدَ ٱللَّهِ مِنۢ بَعْدِ مِيثَٰقِهِۦ وَيَقْطَعُونَ مَآ أَمَرَ ٱللَّهُ بِهِۦٓ أَن يُوصَلَ وَيُفْسِدُونَ فِى ٱلْأَرْضِ ۚ أُو۟لَٰٓئِكَ هُمُ ٱلْخَٰسِرُونَ ﴿٢٧﴾

**जे लोक अल्लाहतआलाशी झालेल्या[३] पक्क्या कराराला तोडून टाकतात: आणि अल्लाहतआलाने ज्या संबंधांना जोडण्याचा हुकूम केला आहे, ते संबंध पार तोडून टाकतात: आणि पृथ्वीवर अनाचार भटकवितात, हेच लोक शेवटी तोट्यात राहतील[४] ㉗**

(१) जेव्हा अल्लाहतआलाने तोड करून देणाऱ्या पुराव्यानिशी, कुरआन हा एक चमत्कार आहे, हे सिद्ध करून दिले; तेव्हा काफिरांनी एका वेगळ्या पद्धतीने हल्ला केला, की हे पुस्तक जर अल्लाहची वाणी असती तर अशा उच्च व्यक्तीत्वाने अवतरीत केलेल्या या (ईश) वाणीत अशा छोट्या-छोट्या क्षुल्लक गोष्टीचे दृष्टांत दिले गेले नसते. अल्लाहतआलाने याच्या उत्तरात म्हटले की, गोष्टीच्या स्पष्टीकरणासाठी ठोस युक्तीला दृष्टीसमोर ठेऊन, अशा गोष्टींवर चर्चा करण्यास काहीच हरकत नाही, त्यामुळे असला दृष्टांत देण्यात कुठलाच संकोच आणि आडपरदा नाही. ''फौकहा'' जे चिलाटापेक्षाही (क्षुल्लकतेत) वरचढ असलेले म्हणजे (चिलटाचे) त्याचे पंख ध्वनीत होतात, जे चिलटापेक्षाही क्षुल्लक आहे. किंवा फौक चा अर्थ याच्यापेक्षाही क्षुल्लकतेत वाढलेली एखादी वस्तू असा होईल शब्द ''फौकहा'' मध्ये दोन्ही अर्थाची शक्यता आहे.

(२) अल्लाहतआलाने वर्णन केलेल्या दृष्टांतामुळे ईमानवाल्यांच्या विश्वासात वृद्धी आणि काफिरांच्या नाकारण्यामध्ये वृद्धी होत असते. आणि हे सर्व अल्लाहच्या निसर्ग नियमाप्रमाणे निर्धारीत केल्याप्रमाणे होत असते जसे कुरआनात म्हटले आहे ''नु वल्लीही मा तवल्ला'' (सू. निसा-११५) (जो जिकडे वळतो आम्ही सुद्धा त्याला तिकडेच वळून देतो) आणि हदीसीत सुद्धा ''कुल्लुन मोयस्सरून लिमा खुलिकलहु'' प्रत्येक व्यक्तीसाठी तीच गोष्ट सोपी केली जाते, जिच्यासाठी त्या गोष्टीस निर्माण केले गेले आहे. (स.बुखारी तफसीर सू. अललैल) ने वर्णन केलेले आहे. आज्ञाभंजन अल्लाहच्या आज्ञापालनातून बाहेर पडून जाण्याला म्हणतात. असे कधी कधी काही काळापुरते एखाद्या मोमिन कडून पण होऊ शकते, परंतु या महावाक्यात आज्ञाभंजन (फिस्क)चा अर्थ अल्लाहच्या आज्ञापालनातून कायमचे बाहेर पडणे म्हणजे इन्कार करणे (कुफ्र) होय. जसे पुढच्या महावाक्यावरून स्पष्ट होते. ईमानवाल्यापेक्षा काफिरांच्या (नास्तिकांच्या) वैशिष्टयांची चर्चा आहे.

(३) भाष्यकारांनी ''अहेदुन'' (वचन) चे वेगवेगळे अर्थ सांगितले आहे. उदा.

(अ) अल्लाहची ती वसीयत, जी त्याने आपल्या पैगंबरांना केली, ज्यात त्याच्या आज्ञांचे पालन करण्याचे व त्याने मना केलेल्या गोष्टींपासून दूर राहण्याचे आदेश लोकांना दिले

(ब) आणि ते वचन ग्रंथधारी लोकांकडून घेतले गेले, जे तौरात मध्ये आहे, की शेवटी येणाऱ्या नबी ﷺ आल्यानंतर त्यांना मान्यता देणे, आणि त्यांच्या पैगंबरीवर ईमान आणणे आवश्यक आहे.

(क) ते वचन जेव्हा आदमच्या पाठीतून काढल्यानंतर, सर्व आदमांच्या संततीकडून वचन घेण्यात आले होते, ज्याचा उल्लेख कुरआनात आहे, ''जेव्हा तुझ्या पालनकर्त्याने आदमच्या संततीपासून म्हणजे त्यांच्या पाठीतून त्यांचा वंश काढून.'' ('सू. आराफ महावाक्य १७२') नक़्ज अहद म्हणजे कराराची पर्वा न करणे होय (इब्ने कसीर)

(४) हे स्पष्ट जाहीर आहे की नुकसान, अल्लाहचे आज्ञाभंग करणाऱ्यांचे होईल. अल्लाहचे किंवा पैगंबराचे किंवा (आमंत्रण) आवाहन देणाऱ्यांचे नुकसान होणार नाही.

كَيْفَ تَكْفُرُونَ بِاللَّهِ وَكُنْتُمْ أَمْوَاتًا فَأَحْيَاكُمْ ۖ ثُمَّ يُمِيتُكُمْ ثُمَّ يُحْيِيكُمْ ثُمَّ إِلَيْهِ تُرْجَعُونَ ﴿٢٨﴾

तुम्ही अल्लाहतआलाला कसे नाकारतात? (खरे पाहता) तुम्ही निर्जीव होता तेव्हा त्याने तुम्हाला सजीव केले, मग तोच तुम्हाला मारून टाकेन, नंतर पुन्हा (कयामतच्या दिवशी) जिवंत करील[१]. मग त्याच्याकडे तुम्ही परतून जाणार आहात (२८)

هُوَ الَّذِي خَلَقَ لَكُمْ مَا فِي الْأَرْضِ جَمِيعًا ثُمَّ اسْتَوَىٰ إِلَى السَّمَاءِ فَسَوَّاهُنَّ سَبْعَ سَمَاوَاتٍ ۚ وَهُوَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيمٌ ﴿٢٩﴾

तोच (तर) अल्लाह आहे, ज्याने तुमच्याकरता पृथ्वीत सर्व वस्तू निर्माण[२] केल्या. नंतर आकाशाकडे लक्ष्य दिले[३] आणि त्याची ठीक-ठीक सात आकाशे बनवली[४]. आणि तो प्रत्येक वस्तुला (चांगल्याप्रकारे) जाणतो. (२९)

وَإِذْ قَالَ رَبُّكَ لِلْمَلَائِكَةِ إِنِّي جَاعِلٌ فِي الْأَرْضِ خَلِيفَةً ۖ قَالُوا أَتَجْعَلُ فِيهَا مَنْ يُفْسِدُ فِيهَا وَيَسْفِكُ الدِّمَاءَ وَنَحْنُ نُسَبِّحُ بِحَمْدِكَ وَنُقَدِّسُ لَكَ ۖ قَالَ إِنِّي أَعْلَمُ مَا لَا تَعْلَمُونَ ﴿٣٠﴾

आणि जेव्हा आपल्या पालनकर्त्याने देवदूतांना[५] सांगितले, मी पृथ्वीवर खलीफा नेमणार आहे, तेव्हा ते बोलले[६] की, तू अशा मनुष्याला का निर्माण करतो, जो पृथ्वीत अनाचार फैलावील आणि रक्तपात घडवील ? आणि आम्हीतर तुझी प्रशंसा, स्तुती आणि पवित्रता वर्णन करतो. अल्लाहतआलाने म्हटले जे मला ठाऊक आहे, ते तुम्ही जाणत नाही[७]. (३०)

وَعَلَّمَ آدَمَ الْأَسْمَاءَ كُلَّهَا ثُمَّ عَرَضَهُمْ عَلَى الْمَلَائِكَةِ فَقَالَ أَنْبِئُونِي بِأَسْمَاءِ هَٰؤُلَاءِ إِنْ كُنْتُمْ صَادِقِينَ ﴿٣١﴾

आणि अल्लाहतआलाने आदमला सर्व नावे शिकवून त्या वस्तूंना देवदूतांपुढे ठेवले आणि सांगितले की, जर तुम्ही खरे असाल, तर या वस्तुंची नांवे सांगा (३१)

قَالُوا سُبْحَانَكَ لَا عِلْمَ لَنَا إِلَّا مَا عَلَّمْتَنَا ۖ إِنَّكَ أَنْتَ الْعَلِيمُ الْحَكِيمُ ﴿٣٢﴾

ते म्हणाले हे अल्लाह ! तू पवित्र आहेस. आम्हाला तर तेवढेच ज्ञान आहे; जेवढे तू आम्हाला शिकविले आहे. खरोखर तूच ज्ञानी आणि सत्यसंकल्प आहेस (३२)

قَالَ يَا آدَمُ أَنْبِئْهُمْ بِأَسْمَائِهِمْ ۖ فَلَمَّا أَنْبَأَهُمْ بِأَسْمَائِهِمْ قَالَ أَلَمْ أَقُلْ لَكُمْ إِنِّي أَعْلَمُ غَيْبَ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ وَأَعْلَمُ مَا تُبْدُونَ وَمَا كُنْتُمْ تَكْتُمُونَ ﴿٣٣﴾

अल्लाहतआलाने ह.आदम(अ.)ला सांगितले, तुम्ही यांची नांवे दाखवा. जेव्हा त्यांनी नांवे दाखविली, तेव्हा (अल्लाहने) सांगितले की मी तुम्हाला पूर्वीच सांगितले नव्हते की, आकाश आणि पृथ्वीच्या परोक्ष गोष्टी मी जाणतो आणि मला ठाऊक आहे, जे तुम्ही जाहीर करीत होता आणि तुम्ही (मनात) लपवित होता[८]. (३३)

وَإِذْ قُلْنَا لِلْمَلَائِكَةِ اسْجُدُوا لِآدَمَ فَسَجَدُوا إِلَّا إِبْلِيسَ أَبَىٰ وَاسْتَكْبَرَ وَكَانَ مِنَ الْكَافِرِينَ ﴿٣٤﴾

आणि जेव्हा आम्ही देवदूतांना सांगितले की, आदम (अ.) ला सिजद: करा[९]; तेव्हा इब्लिसला सोडून सर्वांनी सिजद: केला. त्याने नकार[१०] दिला व शेखीत आला आणि तो नाकारणारा[११] बनून बसला (३४)

(१) या महावाक्यात दोन मृत्यूंची आणि दोन जीवनांची चर्चा आहे. पहिला मृत्यू अदम (म्हणजे अस्तित्वात नसणे) आहे. आणि पहिले जीवन आईच्या पोटातून निघाल्यापासून मृत्यू येण्यापर्यंत आहे. नंतर मृत्यू येईल. आणि परलोकातील जीवन हे दुसरे जीवन राहील, ज्यांचा नास्तिक आणि कयामतला नाकारणारे इन्कार करतात. या दृष्टीने (विचार केला तर) कबरीतील जीवन हे या दुनियेतल्या जीवनातच सामील आहे. (फत्हुल कदीर) सत्य हे आहे की, बरज़ख (दुनिया आणि परलोकामधील आड) चे जीवन हे परलोकाच्या जीवनाची पुढे येणारी एक झलक आहे. म्हणून कबरीतल्या जीवनाचा संबंध पारलौकीक जीवनाशी आहे.

(२) याच्याने ज्या गोष्टीसाठी आधार घेण्यात आला आहे की, सृष्टीतील वस्तुंसाठी (म्हणजे त्यांच्या उपयोगासाठी) मूळ गोष्ट, तिचे अल्लाहकडून विहीत होणे (हिल्लत) हे आहे; या शिवाय की ज्या वस्तूंची मनाई कुरआन शरीफच्या साफ आणि स्पष्ट महावाक्याने (नस्स) ने सिद्ध आहे. (फत्हुल कदीर)

(३) काही विद्वानांनी यांचे भाषांतर ''पुन्हा आकाशाकडे चढून गेला असे'' केले आहे. (स.बुखारी) अल्लाहतआलाचे आकाशाच्यावर असलेला अर्श महासिंहासनावर चढणे, आणि काही खास खास समयी, या जगाच्या आकाशावर अवतरीत होणे, अल्लाहच्या विशिष्ट गुणसंज्ञेमधून आहे. जसे कुरआन आणि हदीसीमध्ये वर्णन केले त्यावर

कुठल्याही प्रकारच्या का,करसे शिवाय ईमान आणणे जरूरी आहे.
(४) याच्याने हे माहित झाले की आकाश हे वास्तवात अस्तित्वात आहे. फक्त उंची आणि निव्वळ पोकळी नाही. दुसरी गोष्ट ही माहित झाली की, आकाशांची संख्या सात आहे. आणि हदीसीप्रमाणे, दोन आकाशातील अंतर, पाचशे वर्षाच्या प्रवासाइतके आहे. आणि जमिनीबाबत कुरआनात आहे की, 'व मिनल अर्जी मिस्ल हुन्न.' (सू. तलाक महावाक्य-१२) (''आणि जमीन पण आकाशासारखी आहे.'') या वरून जमिनींची संख्यापण सातच असल्याचे माहित होते. ज्याचे समर्थन या हदीसीवरून होते. ''ज्याने अन्यायाने, कोणाची एक बिल्लास जमीन हडप केली तर अल्लाहतआला त्याला सात जमिनीचा मानखोडा घालीन.'' या महावाक्यावरून हे पण माहित होते की, आकाशापूर्वी जमिनीची निर्मिती झाली आहे. परंतु सू.नाजेआत मध्ये असे म्हटले आहे की, आकाशांच्या वर्णनानंतर, 'जमिनीला यांच्यानंतर अंथरले याचा खुलासा असा करण्यात आला की, निर्मिती प्रथम जमिनीची झाली व, ''दहव'' (स्वच्छ आणि सपाट करून अंथरली) निर्मितीपेक्षा, ही वेगळी गोष्ट आहे. जी आकाशाच्या निर्मितीनंतर अमलांत आली. (फत्हुल कदीर)
५) देवदूत ही अल्लाहची नूरी (म्हणजे प्रकाशापासून निर्माण झालेली) निर्मिती आहे. जे आकाशात राहतात. जे अल्लाहतआलाच्या आदेशाप्रमाणे काम करतात, आणि नेहमी अल्लाहची स्तुती आणि प्रशंसा करण्यात मग्न असतात आणि त्याच्या कुठल्याही आदेशाची अवहेलना करीत नाही.
६) प्रतिनिधी (खलीफा) ने येथे अभिप्रेत अशी कौम आहे जी एक दुसऱ्यानंतर येईलआणि असे म्हणणे की, मनुष्य या जगात अल्लाहचा खलीफा आणि नायब आहे, हे एकदम चूकीचे आहे.
७) देवदूतांचे असे म्हणणे, इर्ष्या आणि स्वार्थी पोटी नव्हते. परंतु यातील सत्य आणि तत्त्व दर्शितेसाठी होते, की हे आमच्या पालनकर्त्या मानवजातीच्या निर्मितीमागे काय उद्देश आहे ? जेव्हा त्यांच्यात असे लोक पण असतील जे फसाद फैलावतील, आणि रक्तपात पण करतील. जर उद्देश असेल की, तुझी उपासना केली जावी, तर या कामासाठी आम्ही तर आहोतच, आमच्यापासून ते धोकेही नाहीत जे या नव्या निर्मितीत संभवतात. अल्लाहतआलाने म्हटले, मी जे गुण जाणतो, त्यानुसार तुम्ही वर्णन केलेल्या वाईट गोष्टींच्या बावजूद, मी मानवाला निर्माण करीत आहे, जे तुम्ही जाणत नाही, कारण यांच्यात पैगंबर, हुतात्मा, आणि पुण्यवान लोक तसेच परहेजगार आणि औलीयापण निर्माण होतील (इब्ने कसीर)
८) नावाने अभिप्रेत व्यक्ती आणि वस्तूचे नाव आणि वैशिष्टय व गुण याचे ज्ञान होय, जे अल्लाहतआलाने आपल्याकडून ह.आदम عليه السلام च्या मनात टाकून दिले आणि जेव्हा हे सांगितले गेले की त्यांची नांवे आणि फायदे सांगा तेव्हा ताबडतोब सर्व काही त्यांनी सांगून टाकले, जे देवदूत सांगू शकले नाही. अशा प्रकारे अल्लाहतआलाने आदम عليه السلام च्या निर्मितीमागची भूमिका देवदूतांसमोर स्पष्ट केली. दुसरे असे की या जगाची व्यवस्था पाहण्यासाठी ज्ञानाचे महत्त्व आणि श्रेष्ठत्व पण स्पष्ट केले. तेव्हा त्यांनी आपल्या अज्ञानाचा स्वीकार केला. देवदूतांनी हे मान्य केल्यामुळे त्यांना हे ही ठाऊक झाले की, परोक्षाचा ज्ञाता फक्त अल्लाहतआलाच आहे. अल्लाहतआलाच्या निस्सीम सेवकांना देखील फक्त तेवढेच (परोक्षाचे) ज्ञान प्राप्त होते, जेवढे अल्लाह त्यांना देऊ इच्छितो.
९) ज्ञानाच्या श्रेष्ठत्वानंतर, ह.आदम عليه السلام चा हा दुसरा गौरव आहे. साष्टांग नमस्काराचा अर्थ आहे. ''जमिनीवर कपाळाला टेकवणे'' असा साष्टांग नमस्कार (सजदा) इस्लामी धर्मशास्त्रानुसार अल्लाहतआला शिवाय कोणालाही करणे योग्य नाही. नबी ﷺ चा सुपरिचित आदेश आहे की, ''जर सजदा करणे (अल्लाहतआलाला सोडून) दुसऱ्या कोणासाठी योग्य असते; तर मी (प्रत्येक) स्त्रीला, आदेश दिला असता की तिने आपल्या पतीला सजदा करावा''. (तिरमिझी) तथापि देवदूतांनी अल्लाहच्या आज्ञेने ह.आदम عليه السلام ला सजदा केला. त्यामुळे त्यांचा गौरव व श्रेष्ठत्व देवदूतांवर जाहीर करून देण्यात आले. कारण हा सजदा त्यांचा गौरवार्थच होता, उपासनेसाठी नव्हता. आता सन्मानार्थपण कोणाला सजदा केला जाऊ शकत नाही.
१०) शैतानाने सजदा करण्यास नकार दिला आणि अल्लाहच्या दरबारातून बहिष्कृत झाला. शैतान, कुरआनाच्या म्हणण्याप्रमाणे जिन्नातां(यक्षलोक) पैकी होता. परंतु अल्लाहतआलाने त्याला सन्मानित करून देवदूतांत शामील करून घेतले. यामुळे अल्लाहच्या आज्ञेप्रमाणे त्याच्यासाठी सुद्धा सजदा करणे आवश्यक होते, परंतु त्याने इर्ष्या आणि गर्वामुळे, सजदा करण्यास नकार दिला. जणूकाही इर्ष्या आणि गर्व या पापांचे, मानवी जगात, प्रथमच शैतानाकडून प्रचलन झाले.
११) म्हणजे अल्लाहतआलाचे नित्याचे ज्ञानाप्रमाणे.

وَقُلْنَا يٰٓاٰدَمُ اسْكُنْ اَنْتَ وَزَوْجُكَ الْجَنَّةَ وَكُلَا مِنْهَا رَغَدًا حَيْثُ شِئْتُمَا ۠ وَلَا تَقْرَبَا هٰذِهِ الشَّجَرَةَ فَتَكُوْنَا مِنَ الظّٰلِمِيْنَ ﴿٣٥﴾

आणि आम्ही सांगितले, की हे आदमा! तू आणि तुझी पत्नी स्वर्गात[१] रहा. आणि तेथे तुमच्या मर्जीत येईल ते खूप खा (व प्या); परंतु या वृक्षाच्या जवळही फिरकू[२] नका (असे कराल तर) तुम्ही जालिमांत सामील व्हाल. (३५)

فَاَزَلَّهُمَا الشَّيْطٰنُ عَنْهَا فَاَخْرَجَهُمَا مِمَّا كَانَا فِيْهِ ۠ وَقُلْنَا اهْبِطُوْا بَعْضُكُمْ لِبَعْضٍ عَدُوٌّ ۚ وَلَكُمْ فِى الْاَرْضِ مُسْتَقَرٌّ وَّمَتَاعٌ اِلٰى حِيْنٍ ﴿٣٦﴾

परंतु शैतानाने त्यांना बहकविले, व तेथून काढवूनच[३] टाकले, आम्ही सांगितले, (खाली) उतरून जा तुम्ही एक दुसऱ्याचे शत्रू[४] आहात आणि एका खास वेळेपर्यंत पृथ्वीवर राहण्याचे ठिकाण, आणि तिच्यातून फायदा प्राप्त करून घेणे आहे. (३६)

فَتَلَقّٰٓى اٰدَمُ مِنْ رَّبِّهٖ كَلِمٰتٍ فَتَابَ عَلَيْهِ ۭ اِنَّهٗ هُوَ التَّوَّابُ الرَّحِيْمُ ﴿٣٧﴾

ह.आदम (अ.) ने आपल्या पालन कर्त्याकडून (क्षमा) याचनेचे काही शब्द शिकून घेतले[५] आणि अल्लाहतआलाने त्यांची क्षमा याचना कबूल केली. नि:संशय तो मोठाच पश्चात्ताप मान्य करणारा व दयाळू आहे (३७)

قُلْنَا اهْبِطُوْا مِنْهَا جَمِيْعًا ۚ فَاِمَّا يَاْتِيَنَّكُمْ مِّنِّىْ هُدًى فَمَنْ تَبِعَ هُدَاىَ فَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿٣٨﴾

आम्ही सांगितले तुम्ही सर्वजण येथून चालते व्हा. जेव्हा कधी, तुमच्याकडे माझ्याकडून मार्गदर्शन पोहोचेल, तर त्याप्रमाणे चालणाऱ्यांना कुठलेही भय आणि दु:ख नाही (३८)

وَالَّذِيْنَ كَفَرُوْا وَكَذَّبُوْا بِاٰيٰتِنَآ اُولٰۗىِٕكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ هُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٣٩﴾ ع

आणि जे लोक इन्कार करतील, आणि आमच्या निशाऱ्यांना खोटे म्हणतील, ते नरकात जाणारे असतील व ते निरंतर त्याच्यात राहतील[६] (३९)

४ ५० ४

يٰبَنِىْٓ اِسْرَاۗءِيْلَ اذْكُرُوْا نِعْمَتِىَ الَّتِىْٓ اَنْعَمْتُ عَلَيْكُمْ وَاَوْفُوْا بِعَهْدِىْٓ اُوْفِ بِعَهْدِكُمْ ۚ وَاِيَّاىَ فَارْهَبُوْنِ ﴿٤٠﴾

हे बनी इस्राईलांनो[७]! माझ्या त्या देणगीची आठवण करा, जी तुम्हास दिली होती. आणि तुम्ही माझ्याशी केलेला करार पुरा करा, मी (पण) तुमच्याशी केलेला करार पूर्ण करीन आणि माझे भय बाळगा (४०)

وَاٰمِنُوْا بِمَآ اَنْزَلْتُ مُصَدِّقًا لِّمَا مَعَكُمْ وَلَا تَكُوْنُوْٓا اَوَّلَ كَافِرٍۢ بِهٖ ۠ وَلَا تَشْتَرُوْا بِاٰيٰتِىْ ثَمَنًا قَلِيْلًا ۡ وَّاِيَّاىَ فَاتَّقُوْنِ ﴿٤١﴾

आणि (या पुस्तकावर) (कुरआनवर) ईमान आणा. जे मी तुमची पुस्तके (तौरात आणि इंजील) यांचे सत्यत्त्व पटविण्यासाठी अवतरीत केले आहे. आणि तुम्हीच याला[८] पहिले नाकारणारे बनू नका. आणि माझ्या महावाक्यात (फेरबदल) करून, अत्यल्प किंमतीत[९] ती विकू नका, आणि फक्त माझेच भय बाळगा (४१)

وَلَا تَلْبِسُوا الْحَقَّ بِالْبَاطِلِ وَتَكْتُمُوا الْحَقَّ وَاَنْتُمْ تَعْلَمُوْنَ ﴿٤٢﴾

आणि सत्याला असत्याचे आवरण घालू नका, आणि सत्याला लपवू नका, तुम्हाला स्वत:लाच त्यांचे ज्ञान आहे (४२)

وَاَقِيْمُوا الصَّلٰوةَ وَاٰتُوا الزَّكٰوةَ وَارْكَعُوْا مَعَ الرّٰكِعِيْنَ ﴿٤٣﴾

आणि नमाजीला कायम करा; आणि जकात द्या, आणि रूकूअ करणाऱ्यांबरोबर रूकूअ करा. (४३)

اَتَاْمُرُوْنَ النَّاسَ بِالْبِرِّ وَتَنْسَوْنَ اَنْفُسَكُمْ وَاَنْتُمْ تَتْلُوْنَ الْكِتٰبَ ۭ اَفَلَا تَعْقِلُوْنَ ﴿٤٤﴾

काय? लोकांना भलाई करण्याचा हुकूम देतात, आणि स्वत:लाच विसरून जातात? येथपावेतो की, तुम्ही पुस्तकाचे वाचन करीत असतात; काय, तुमच्यात इतकीही समज नाही? (४४)

१) हा, ह.आदम عليه السلام चा तिसरा सन्मान आहे, जो स्वर्गात राहण्याचे ठिकाण बनवून त्यांना देण्यात आला.

२) हा वृक्ष कशाचा होता? याबाबत कुरआन व हदीसमध्ये काही खुलासा नाही. याला गव्हाचे झाड, म्हणून मशहूर केले गेले आहे. जी खरी गोष्ट नाही. आम्हाला त्या वृक्षाचे नाव माहित करून घेण्याची आवश्यकता नाही. आणि त्यापासून आमचा काही फायदा होण्यासारखा नाही.

३)शैतानाने स्वर्गात प्रवेश करून प्रत्यक्षात भेटून का मनांत वसवसा टाकून त्यांना बहकविले याबाबत काही खुलासा नाही, परंतु हे स्पष्ट आहे की, सजदाच्या आदेशाच्यावेळी त्याने ईश्वरआज्ञेच्या विरोधात अटकळी (कयास) नुसार, की मी आदम عليه السلام पेक्षा श्रेष्ठ आहे, सजदा करण्यास नकार दिला, त्याप्रमाणे यावेळी अल्लाहतआलाचा आदेश (वला तकरबा) ची अवहेलना करून ह.आदम عليه السلام ला बहकाविण्यात तो यशस्वी झाला. (ज्याचा सविस्तर वृत्तांत, सू.आअराफ मध्ये येईल) जणू काही ईश आज्ञेच्या विरोधात अटकळ (कयास) आणि कुरआनाच्या स्पष्ट हुकूमाची (नस्स) अवहेलना करण्याची सुरवात पण शैतानानेच केली. (अल्लाहतआला आम्हाला अशांमध्ये न करो! आमीन)

४) याच्याने अभिप्रेत आदम ﷺ व शैतान आहे. किंवा याचा अर्थ असा की आदम ﷺ ची संतती, आपसात एक-दुसऱ्याचे शत्रू आहेत.

५) ह.आदम ﷺ पश्चात्तापाच्या अश्रूंनी न्हाऊन लज्जीत अवस्थेत, जेव्हा या जगात दाखल झाले, तेव्हा क्षमा याचना व पश्चात्ताप व्यक्त करण्यात मग्न झाले. त्यावेळी सुद्धा अल्लाहतआलाने मार्गदर्शन आणि मदत केली. आणि क्षमा याचनेचे ते शब्द शिकवून दिले जे सू.आराफ मध्ये वर्णन केले आहे. ''रब्बना जलमना अनफुसना व इल्लम तगफिरलना व तरहमना लनकुनन्ना मिनल खासिरीन''. काही लोक येथे एका असत्य रिवायती नुसार सांगतात की, ह. आदम ﷺ नी अल्लाहच्या महासिंहासनावर ''ला इलाह इल्लल्लाहु मुहम्मदुर्ररसूलुल्लाह'' लिहीलेले पाहिले, आणि मुहम्म्द रसूलुल्लाह ﷺ च्या वशिल्याने प्रार्थना केली. तेव्हा अल्लाहतआलाने त्यांना क्षमा केली. ही रिवायत बेसनद आहे आणि कुरआनाच्यापण विरोधात आहे. याशिवाय अल्लाहतआलाने दाखविलेल्या पद्धतीच्याही विरूद्ध आहे. सर्व अंबिया ﷺ नी नेहमी सरळ अल्लाहतआलाजवळ दुआ केली आहे. कोणी नबी,वली बुजुर्गचा वसीला आणि वास्ता धरला नाही. म्हणून नबी करीम ﷺ सहित, सर्व पैगंबरांची दुआची हिच पद्धत होती की, कुठल्याही वसीला आणि वास्त्याशिवाय सरळ अल्लाहतआलाजवळ दुआ केली जावी.

६) क्षमा याचना स्वीकारल्यानंतर सुद्धा, अल्लाहतआलाने त्यांना (आदम ﷺ ला) पुन्हा दुसऱ्यांदा स्वर्गात स्थानापन्न करण्याऐवजी या जगातच राहून स्वर्ग प्राप्ती करण्यास सांगितले आणि ह.आदम ﷺ च्या सर्व संततीला स्वर्गाचा हा मार्ग दाखविण्यात येत आहे की, (अंबिया ﷺ) च्या मार्फत माझे मार्गदर्शन, (जीवन जगण्याचे आदेश आणि त्यांची कार्यपद्धती) तुमच्या पर्यंत पोहचेल. जो याला कबूल करेल, तो स्वर्गाचा दावेदार, आणि अन्यथा कबूल न केल्यास अल्लाहच्या प्रकोपास पात्र राहील. ''त्यांना भय राहणार नाही'' चा संबंध परलोकाशी आहे. ''दु:खी होणार नाहीत'' चा संबंध इहलोकाशी आहे. ज्याप्रमाणे दुसऱ्या जागी म्हटले आहे. ''ज्याने माझ्या मार्गदर्शनाचे अनुकरण केले, तो जगात मार्गभ्रष्ट होणार नाही आणि परलोकात त्याला कष्टही भोगावे लागणार नाही.'' (सू.ताहा १२३) (इब्ने कसीर) ''जणूं''. ''लाखौफुन अलैहिम वला हुम यहज़नून'' चा दर्जा प्रत्येक सच्च्या मोमिनला प्राप्त आहे; हा काही असा दर्जा नाही की काही खास औलिया अल्लाहनाच प्राप्त होतो. आणि या अवस्थेबद्दल काहीचे काही सांगितले जाते. वास्तविक पाहता सर्व विश्वासू, आणि परहेजगार औलिया अल्लाहच आहेत. औलिया अल्लाह ही काही अल्लाहतआलाची वेगळी खास अशी निर्मिती नाही. हां तथापि औलियांच्या श्रेणीमध्ये फरक असू शकतो.

७) इस्राईल (म्हणजे अल्लाहचा सेवक (बंदा)) ह.याकूब ﷺ चे हे एक उपनांव होते. यहूद्यांना बनु इस्राईल म्हटले जाते. म्हणजे ह.याकूब ﷺ ला बारा पुत्र होते ज्यापासून यहुद्यांची बारा घराणी बनली, आणि त्यांच्यात मोठ्या प्रमाणात अंबिया आणि रसूल झालेत. यहूद्यांना त्यांचा मागील भूतकाळ त्यांचे ज्ञान, धर्माशी संलग्नता यामुळे अरबस्तानात एक वैशिष्टपूर्ण मान होता. म्हणून त्यांना मागील, त्यांच्या वरील अल्लाहच्या उपकारांची आठवण करून देऊन सांगितले जात आहे की, तुम्ही नबी ﷺ ची पैगंबरी आणि त्यांच्यावर ईमान आणण्याचे, आपणांपासून जे वचन घेण्यात आले होते ते पूर्ण करा. जर तुम्ही हे वचन पूर्ण केले तर मी (अल्लाह) सुध्दा माझे वचन पूर्ण करेन. म्हणजे तुमच्यावरील ओझे मी उतारून देईन. जे तुमच्या चुकांमुळे आणि कोताईमुळे शिक्षा म्हणून तुमच्यावर लादण्यात आले होते. आणि तुम्हाला दुसऱ्यांदा उच्चस्थानी विराजमान करण्यात येईल आणि मला भ्या, की मी तुम्हाला सतत होणाऱ्या मानहानी व रूसवाई मध्येच अडकवून ठेवू शकतो. ज्यात तुम्ही अडकलेले आहात, आणि तुमचे वाडवडील पण अडकलेले होते.

८) ''बिही' ने अभिप्रेत कुरआन शरीफ किंवा ह.मोहम्मद ﷺ आहे. दोन्ही कथन योग्य आहेत. कारण दोन्ही आपसात एक दुसऱ्याला पुरक आहेत. ज्याने कुरआनाचा इन्कार केला त्याने मोहम्मद ﷺ चा इन्कार केला. ज्याने मोहम्मद ﷺ चा इन्कार केला त्याने कुरआनाचा इन्कार केला (इब्ने कसीर) ''पहिलेच नाकारणारे होऊ नका'' चा अर्थ असा आहे की, तुम्हाला जे ज्ञान आहे, दुसरे त्या ज्ञानापासून वंचित आहेत म्हणून तुमची जबाबदारी सर्वात जास्त आहे. दुसरे असे की मदीनेत सर्वांत आधी यहूद्यांना ईमान आणण्याचे आमंत्रण देण्यात आले तथापि,हिजरतपूर्वी पुष्कळशा लोकांनी इस्लाम धर्मात प्रवेश केला होता. म्हणून त्यांना तंबी करण्यात येत आहे की यहूद्यांमध्ये तुम्ही प्रथम नाकारणारे बनू नका. जर तुम्ही असे कराल, तर तमाम यहूदी लोकांच्या नाकारण्याचे ओझे पण तुमच्यावरच पडेल.

९) ''अत्यल्प मोबदल्यात विकू नका'' याचा अर्थ असा नाही की, जास्त किंमत मिळत असेल तर अल्लाहच्या आदेशांचा सौदा करून घ्या. परंतु अर्थ असा की, अल्लाहच्या आदेशांपुढे ऐहिक फायद्यांना महत्त्व देऊ नका. अल्लाहचे आदेश इतके किंमती आहेत की, त्यांच्या मुकाबल्यात साऱ्या दुनियाची मालमत्ता अगदी क्षुल्लक आणि नगण्य आहे. या महावाक्यात जरी हे संबोधन बनी ईसराईलसाठी असले तरी हा आदेश कयामत पर्यंत येणाऱ्या सर्व लोकांसाठी आहे, जो कोणी सत्याला खोटे ठरवील किंवा असत्याला प्रमाणित करेल किंवा सत्य ज्ञानाला लपविण्याचे पाप करेल आणि सत्य प्रस्तापित करण्याला केवळ ऐहिक फायद्यांसाठी या पासून तोंड फिरवील (पळ काढील) तो या तंबीत सामील राहील (फत्हुल कदीर)

وَاسْتَعِينُوا بِالصَّبْرِ وَالصَّلَاةِ ۚ وَإِنَّهَا لَكَبِيرَةٌ إِلَّا عَلَى الْخَاشِعِينَ ﴿٤٥﴾

**आणि सहनशिलता व नमाज द्वारे मदत[१] मागा, ही (नमाज व सहनशिलता) फार कठीण गोष्ट आहे, परंतु जे (अल्लाहला) भितात[२] (४५)**

الَّذِينَ يَظُنُّونَ أَنَّهُم مُّلَاقُو رَبِّهِمْ وَأَنَّهُمْ إِلَيْهِ رَاجِعُونَ ﴿٤٦﴾

**जे आपल्या पालनकर्त्यांच्या भेटीची आशा बाळगून आहे की, त्यांचेकडे परतून जाणार आहे. (४६)**

الربع ٥

يَا بَنِي إِسْرَائِيلَ اذْكُرُوا نِعْمَتِيَ الَّتِي أَنْعَمْتُ عَلَيْكُمْ وَأَنِّي فَضَّلْتُكُمْ عَلَى الْعَالَمِينَ ﴿٤٧﴾

**हे याकूबच्या संतानांनो! माझ्या त्या (नेअमत) उपकाराची आठवण करा जो मी तुमच्यावर केला आहे आणि मी तुम्हाला आलम दुनियेत श्रेष्ठत्व दिले[३] (४७)**

وَاتَّقُوا يَوْمًا لَّا تَجْزِي نَفْسٌ عَن نَّفْسٍ شَيْئًا وَلَا يُقْبَلُ مِنْهَا شَفَاعَةٌ وَلَا يُؤْخَذُ مِنْهَا عَدْلٌ وَلَا هُمْ يُنصَرُونَ ﴿٤٨﴾

**त्या दिवसाला भ्या. ज्या दिवशी कोणी-कोणाला नफा पोहचवू शकणार नाही, आणि कुणाची शिफारस कबूल केली जाणार नाही, आणि बदला व प्रतिदान (फिदया) स्वीकारले जाणार नाही. आणि त्यांची कोणत्याही प्रकारची मदत केली जाणार नाही. (४८)**

(१) सहनशिलता आणि नमाज अल्लाहच्या प्रत्येक सेवकाचे मोठे शस्त्र आहे. नमाजीमुळे मोमिनचा संबंध अल्लाहतआलाशी जोडला जातो. ज्यामुळे त्याला अल्लाहचे समर्थन व मदत प्राप्त होते. सहनशिलतेमुळे त्यांच्यांत कर्तव्यनिष्ठा व धर्मावर टिकून राहण्याची दृढ निष्टा प्राप्त होते. हदीसमध्ये आहे, नबी ﷺ ला जेव्हा कधी एखादा कठीण प्रसंग येत असे, तेव्हा ते नमाजीत ताबडतोब मशगुल (व्यस्त) होऊन जात. (मुसनद अहमद, अबु दाऊद, फत्हुल कदीरच्या हवाल्याने).

(२) सर्व साधारण लोकांना नमाजीची पाबंदी करणे मोठे जीवावर येते. परंतु जे लोक अल्लाहसमोर नम्रता आणि व्याकुळता दाखवितात, अशा लोकांना नमाज पढणे सोपे तसेच मनशांतीला व सुखसमृद्धीला कारणीभूत होते. हे ते लोक आहेत, जे कयामतच्या दिवसावर पूर्ण विश्वास ठेवतात. जणू कयामतच्या दिवसावर विश्वास ठेवणे, सत्कृत्य करण्याला सोपे जाते. आणि परलोकाकडून उदासीनता माणसाला निष्काम करून कधी कधी दुष्कृत्य करण्यास सुद्धा प्रवृत्त करते.

(३) येथून दुसऱ्यांदा बनी इस्राईलवर अल्लाहतआलाने जे उपकार केलेत त्यांची त्यांना आठवण करून देण्यात येतआहे. आणि त्यांना कयामतच्या दिवसापासून भिवविण्यात येत आहे. ज्या दिवशी कोणी कोणाच्या काहीही कामी येणार नाही. एक उपकार हा दर्शविण्यात आला की, बनू इस्राईलला उम्मते मोहम्मदीयाच्या पूर्वी जगात सर्व श्रेष्ठ उम्मत होण्याचा सन्मान देण्यात आला होता, जो त्यांनी अल्लाहतआलाच्या नाफरमानीचे पाप करून घालविला आणि उम्मते मोहम्मदियाला ''खैरे उम्मत, हे नामनिधान देऊन गौरवण्यात आले. यात तंबी आहे की, बक्षिसी, उपकार कुण्या विशिष्ट वंशासाठी राखून ठेवण्यात आलेला नाही. परंतु हे ईमान आणि सत्कृत्ये यांच्या आधारावर अवलंबून आहे. ईमान आणि सत्कृत्ये सोडून दिली तर हे (उपकार, बक्षिसी) हिरावून घेण्यात येते. ज्याप्रमाणे यावेळी उम्मते मोहम्मदीया आपल्या दुष्कृत्यांनी आणि शिर्क, बिदअतने (धर्मात नवीन काम) 'खैरे उम्मत' च्या ऐवजी शर्रे उम्मत' बनली आहे. अल्लाहतआला हिदायत देवो!(आमीन)

यहूद्यांनाही असे गुमान होते की, आम्ही तर अल्लाहतआलाचे प्रिय आणि लाडके आहोत. त्यामुळे परलोकाच्या विचारपुसपासून सुरक्षित राहू. त्यावर अल्लाहतआलाने म्हटले, अल्लाहतआलाच्या आज्ञाभंजकांना कोणीही त्या दिवशी आश्रय देऊ शकणार नाही.

याच धोक्यात, उम्मते मोहम्मदीया पण मग्न आहे. शफाअतच्या मामल्यात त्यांनी आपल्या दुष्कृत्यांसाठी बचावाचे साधन बनवून ठेवले आहे. (जे अहेले सुन्नत जवळ एकदम मान्य केलेले आहे.) नबी ﷺ शफाअत जरूर करतील. अल्लाहतआला त्यांची शफाअत पण मान्य करील. (सही हदीस प्रमाणे हे साबित आहे) परंतु हे पण हदीस मध्ये येते की, ''एहेदास फिद्दीन'' (बिदअत) चे पाप करणारे या शफाअतीपासून वंचित राहतील. तसेच पुष्कळशा गुन्हेगारांना नरकात शिक्षा दिल्यानंतर नबी ﷺ च्या शिफारशीनुशीर नरकातून काढले जाईल. काय ही नरकाग्नीची काही थोड्या दिवसांची शिक्षा सहन करण्यासारखी आहे? का आम्ही नबी ﷺ च्या शिफारशींवर विश्वास ठेवून गुन्हा करतच राहावे?

وَاِذْ نَجَّيْنٰكُمْ مِّنْ اٰلِ فِرْعَوْنَ يَسُوْمُوْنَكُمْ سُوْٓءَ الْعَذَابِ يُذَبِّحُوْنَ اَبْنَآءَكُمْ وَيَسْتَحْيُوْنَ نِسَآءَكُمْ ۭ وَفِيْ ذٰلِكُمْ بَلَاۗءٌ مِّنْ رَّبِّكُمْ عَظِيْمٌ ﴿٤٩﴾

**आणि जेव्हा आम्ही तुमची फिरऔनच्या[१] लोकांकडून सुटका केली, जे तुम्हाला वाईटात वाईट शिक्षा करून (छळ करीत होते.) जे तुमच्या मुलांना (ठार) मारून टाकत होते, आणि तुमच्या मुलींना जीवदान देत होते. या सुटका करण्यात तुमच्या पालनकर्त्याची (तुमच्यावर) मोठीच मेहरबानी होती ४९**

وَاِذْ فَرَقْنَا بِكُمُ الْبَحْرَ فَاَنْجَيْنٰكُمْ وَاَغْرَقْنَآ اٰلَ فِرْعَوْنَ وَاَنْتُمْ تَنْظُرُوْنَ ﴿٥٠﴾

**आणि जेव्हा आम्ही तुमच्यासाठी समुद्र दुभंगून[२] टाकला. आणि तुम्हास त्यातून पार पाडले. आणि फिरऔनच्या, लोकांना तुमच्या डोळ्यादेखत बुडवून टाकले ५०**

وَاِذْ وٰعَدْنَا مُوْسٰٓى اَرْبَعِيْنَ لَيْلَةً ثُمَّ اتَّخَذْتُمُ الْعِجْلَ مِنْۢ بَعْدِهٖ وَاَنْتُمْ ظٰلِمُوْنَ ﴿٥١﴾

**आणि आम्ही मूसा (अ.) ला ४० रात्रींचा वायदा केला. त्यानंतर तुम्ही वत्स पुजेत मग्न झालात, आणि कृतघ्न झालात[३] ५१**

ثُمَّ عَفَوْنَا عَنْكُمْ مِّنْۢ بَعْدِ ذٰلِكَ لَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿٥٢﴾

**परंतु आम्ही असे असतांना सुद्धा तुम्हाला क्षमा केली, यासाठी की तुम्ही माझे आभार मानावेत ५२**

وَاِذْ اٰتَيْنَا مُوْسَى الْكِتٰبَ وَالْفُرْقَانَ لَعَلَّكُمْ تَهْتَدُوْنَ ﴿٥٣﴾

**आणि आम्ही ह.मूसा (अ.) ला तुमच्या मार्गदर्शनासाठी पुस्तक (तौरात) आणि चमत्कार दिलेत[४] ५३**

(१) आले फिरऔन ने अभिप्रेत फक्त फिरऔन आणि त्याच्या घरचेच लोक नव्हते, तर फिरऔनला मानणारे सर्व लोक होते. जसे पुढे म्हटले की, ''आम्ही आले फिरऔन बुडवून टाकले.'' यात बुडणाऱ्यांमध्ये फक्त फिरऔनाच्या घरातील लोकच नाहीत, तर त्यांचे सैनिक आणि त्याला मानणारे दुसरे लोकपण होते. जणू कुरआनात आले फिरऔन म्हणजे फिरऔनचे मुत्तेबेईन (अनुयायी) (अनुकरण करणारे) या अर्थात उपयोगात आणले आहे. याचा आणखी खुलासा सू.अहजाब मध्ये इंशाअल्लाह येईल.

(२) समुद्राचे हे दुभंगणे व त्यातून रस्ता बनवून देणे हा एक चमत्कार होता. ज्याचे सविस्तर वर्णन (सू.शुअरा) मध्ये केले गेले आहे. ही समुद्राची भरती ओहोटी नव्हती, जसा की सर सैय्यद अहमद खान आणि दुसऱ्या चमत्कारांना नाकारणाऱ्यांचे विचार आहेत.

(३) हा गोवत्स पुजेचा प्रसंग फिरऔनपासून सुटका झाल्यानंतरचा आहे, जेव्हा बनू इस्राईल सीना द्विप खंडात पोहोचले तेथे अल्लाहतआलाने मूसा عليه السلام ला तौरात देण्यासाठी ४० रात्रींसाठी तूर पर्वतावर बोलाविले. ह.मूसा عليه السلام तिकडे गेल्यावर बनी इस्राईलने सामरीच्या नादी लागून वासरांची पुजा सुरू करून दिली. मनुष्य इतका अज्ञानी आहे की, अल्लाहच्या सामर्थ्याच्या मोठमोठ्या निशाण्या पाहून सुद्धा, आणि पैगंबरांच्या (ह.मूसा व ह.हारून) उपस्थितीत, हंबरण्याची खुबी असलेल्या वासराला आपला उपास्य बनवून घेतले. आजचा मुसलमान पण बहुदेववादी श्रद्धेत आणि कृत्यात फार वाईटरित्या व्यस्त आहे. परंतु तो असे समजतो की मुस्लीम कशा प्रकारे मुशरीक (बहुदेववादी) होऊ शकतो ? या मुशरीक मुस्लीमांनी शिर्कला, दगडांच्या मुर्तींची पुजा करणाऱ्यांसाठीच खास समजून ठेवले आहे, की तेच फक्त मुशरीक आहेत. परंतु हे नांवाचे मुसलमान कबरी आणि पीरांच्या स्थानांवर तेच सर्व काही करतात, जे दगडांचे पुजारी आपल्या मुर्तींबरोबर करतात. (अल्लाहतआला आम्हाला त्यातून न करो ! आमीन)

(४) हा. सुद्धा समुद्र (बहेरे-ए-कुलजूम) पार करून गेल्यानंतरचा प्रसंग आहे. (इब्ने कसीर) शक्यता आहे की, पुस्तक तौरातलाच फुर्कान म्हटले गेले असावे. कारण प्रत्येक आसमानी पुस्तक सत्य व असत्याला स्पष्ट करणारेच असते. किंवा चमत्काराला फुर्कान म्हटले गेले आहे. चमत्कारपण सत्य आणि असत्याची ओळख करण्यात महत्त्वाची भूमिका बजावतात.

وَاِذۡ قَالَ مُوۡسٰی لِقَوۡمِهٖ یٰقَوۡمِ اِنَّكُمۡ ظَلَمۡتُمۡ اَنۡفُسَكُمۡ بِاتِّخَاذِكُمُ الۡعِجۡلَ فَتُوۡبُوۡۤا اِلٰی بَارِئِكُمۡ فَاقۡتُلُوۡۤا اَنۡفُسَكُمۡ ؕ ذٰلِكُمۡ خَیۡرٌ لَّكُمۡ عِنۡدَ بَارِئِكُمۡ ؕ فَتَابَ عَلَیۡكُمۡ ؕ اِنَّهٗ هُوَ التَّوَّابُ الرَّحِیۡمُ ﴿٥٤﴾

**आणि जेव्हा ह. मूसा (अ.) ने आपल्या समाजाला सांगितले की, हे माझ्या समाजबांधवांनो! वासराला आपला उपास्य (देव) बनवून आपल्या जीवावर मोठा जुलूम केला आहे. आता तुम्ही आपल्या निर्माणकर्त्याकडे पश्चात्ताप व्यक्त करा. आणि (तो हाकी) आपल्याच एकदुसऱ्यांना ठार करा! यातच तुमची अल्लाहतआला जवळ भलाई आहे. मग अल्लाहने तुमचा पश्चात्ताप मान्य केला. नि:संशय तो मोठा पश्चात्ताप मान्य करणारा व दयाळू[१] आहे. (५४)**

وَاِذۡ قُلۡتُمۡ یٰمُوۡسٰی لَنۡ نُّؤۡمِنَ لَكَ حَتّٰی نَرَی اللّٰهَ جَهۡرَةً فَاَخَذَتۡكُمُ الصّٰعِقَةُ وَاَنۡتُمۡ تَنۡظُرُوۡنَ ﴿٥٥﴾

**आणि तुम्ही (हेही आठवा) जेव्हा तुम्ही ह.मूसा (अ.) ला सांगितले हे मूसा! जोपर्यंत आम्ही आपल्या पालनकर्त्याला समोर पाहून घेणार नाही, तोपर्यंत आम्ही मुळीच ईमान आणणार नाही. (या उद्धटपणाची शिक्षा म्हणून) तुमच्यावर तुमच्यादेखत[२] वीज कोसळली. (५५)**

ثُمَّ بَعَثۡنٰكُمۡ مِّنۡۢ بَعۡدِ مَوۡتِكُمۡ لَعَلَّكُمۡ تَشۡكُرُوۡنَ ﴿٥٦﴾

**नंतर तुम्ही आभार प्रदर्शन कराल म्हणून या मृत्यूनंतर सुद्धा आम्ही तुम्हाला जिवंत केले. (५६)**

وَظَلَّلۡنَا عَلَیۡكُمُ الۡغَمَامَ وَاَنۡزَلۡنَا عَلَیۡكُمُ الۡمَنَّ وَالسَّلۡوٰی ؕ كُلُوۡا مِنۡ طَیِّبٰتِ مَا رَزَقۡنٰكُمۡ ؕ وَمَا ظَلَمُوۡنَا وَلٰكِنۡ كَانُوۡۤا اَنۡفُسَهُمۡ یَظۡلِمُوۡنَ ﴿٥٧﴾

**आणि आम्ही तुम्हावर ढगांची सावली केली. आणि तुमच्यावर मन्न व सलवा उतारले[३] आणि (सांगून टाकले की) आम्ही दिलेल्या या शुद्ध व चोख्या वस्तू खा. आणि त्यांनी आमच्यावर तर जुलूम केला नाही, परंतु स्वत:च आपल्या जीवावर जुलूम केला (५७)**

१) जेव्हा ह. मूसा عليه السلام नी त्यांच्या शिर्कवर त्यांना तंबी दिली. तेव्हा त्यांना पश्चात्ताप व्यक्त करावासा वाटला. पश्चात्ताप व्यक्त करण्याची ही रीत ठरली की, त्यांनी एक दुसऱ्याचा वध करावा. (आपल्याला आपसात ठार करा.) याची दोन स्पष्टीकरणे केली गेली आहेत. एक असे की सर्वांना दोन रांगेत उभे करण्यात आले आणि त्यांनी एक दुसऱ्याला ठार केले. दुसरे असे की ज्यांनी शिर्कचे पातक केले होते, त्यांना उभे करण्यात आले, आणि जे या पापापासून वाचले होते, त्यांना त्या लोकांना ठार करण्याचा हुकूम देण्यात आला. त्यांनी त्यांना ठार केले. ठार करण्यात आलेल्यांची संख्या ७० हजार सांगण्यात येते (इब्ने कसीर, फत्हुल कदीर)

२) ह.मूसा عليه السلام ७० माणसांना सोबत घेऊन तौरात घेण्यासाठी, तूर पर्वतावर गेले, जेव्हा ह.मूसा عليه السلام परत यावयास निघाले, तेव्हा त्यांनी सांगितले की, जोपर्यंत आम्ही अल्लाहला आमच्या समोर पाहणार नाही, आम्ही तुझ्या सांगण्यावर विश्वास ठेवणार नाही. यावर त्यांच्यावर अल्लाहचा प्रकोप म्हणून वीज कोसळली, आणि ते मरून गेले. ह.मूसा عليه السلام बेहद परेशान झाले आणि त्यांच्या पुनरूपी जिवंत होण्याबद्दल प्रार्थना केली, ज्यावर अल्लाहतआलाने त्यांना दुसऱ्यांदा जिवंत करून दिले. पाहत असता वीज कोसळण्याचा अर्थ असा की, पुढे असणाऱ्या लोकांवर वीज कोसळली, तेव्हा मागे असलेले लोक ते पाहत होते. वास्तविक ते सर्वच मृत्यू पावले.

३)बहुतेक भाष्यकारांजवळ हे इजिप्त व सीरिया यांच्या मध्ये एक 'तिह' नामक मैदान आहे, त्यात हा प्रसंग घडला. जेव्हा त्यांनी अल्लाहतआलाच्या आदेशावरून अमालीकाच्या वस्तीत प्रवेश करण्यास नकार दिला, तेव्हा शिक्षा म्हणून बनू इस्राईलला ४० वर्षेपर्यंत 'तिह' मैदानात पडून रहावे लागले. काहींच्या मते हे सांगणे बरोबर नाही. सीनाच्या वाळवंटात उतरल्यानंतर जेव्हा प्रथम पाणी आणि खाण्याचा प्रश्न निर्माण झाला, तेव्हा ही व्यवस्था करण्यात आली. 'मन्न' काहींच्या मते ओली 'नजबैन' आहे. किंवा दंव जी वृक्षांवर आणि दगडांवर पडते. मधा सारखी गोड असते, आणि वाळल्यानंतर डिंकासारखी होऊन जाते. काहींच्या मते मध किंवा गोड पाणी आहे. सहीहैन मध्ये हदीस आहे की, 'खुनबी', 'मन्न' या प्रकारांपैकी आहे. जी ह. मूसा عليه السلام वर अवतरीत झाली. याचा अर्थ असा की ज्याप्रकारे बनु इस्राईलला हे जेवण कुठल्याही अडचणी शिवाय मिळत होते, त्याचप्रमाणे 'खुनबी' कोणाच्या पेरल्याशिवाय उगवते. (तफसीर अहसनुत्तफासीर) ''सल्वा'' बटेर किंवा चिमणीच्या वर्गातील एक पक्षी होता. ज्याला जबह करून खात असत. (फत्हुल कदीर)

وَاِذۡ قُلۡنَا ادۡخُلُوۡا هٰذِهِ الۡقَرۡيَةَ فَکُلُوۡا مِنۡهَا حَيۡثُ شِئۡتُمۡ رَغَدًا وَّادۡخُلُوا الۡبَابَ سُجَّدًا وَّقُوۡلُوۡا حِطَّةٌ نَّغۡفِرۡ لَـكُمۡ خَطٰيٰكُمۡ‌ؕ وَسَنَزِيۡدُ الۡمُحۡسِنِيۡنَ ﴿۵۸﴾

आणि जेव्हा आम्ही तुम्हास म्हटले की, या वस्तीत दाखल[१] व्हा, आणि जे काही जेथून कोठून इच्छाल यथेच्छ खा आणि प्या. आणि दरवाजातून साष्टांग[२] नमस्कार घालत चला. आणि जिभेने हित्ततून[३] म्हणा. आम्ही तुमचे अपराध क्षमा करून टाकू. आणि सत्कृत्य करणाऱ्यांना आणखी जास्त मोबदला देऊ ५८

فَبَدَّلَ الَّذِيۡنَ ظَلَمُوۡا قَوۡلًا غَيۡرَ الَّذِىۡ قِيۡلَ لَهُمۡ فَاَنۡزَلۡنَا عَلَى الَّذِيۡنَ ظَلَمُوۡا رِجۡزًا مِّنَ السَّمَآءِ بِمَا كَانُوۡا يَفۡسُقُوۡنَ ﴿۵۹﴾

नंतर त्या खोडसळ लोकांनी त्या गोष्टीला जी त्यांना सांगण्यात आली होती, बदलून[४] टाकली. आम्ही पण त्या खोडसळ लोकांवर त्यांच्या आज्ञाभंग करण्यामुळे आकाशातून शिक्षा[५] उतरविली ५९

وَاِذِ اسۡتَسۡقٰى مُوۡسٰى لِقَوۡمِهٖ فَقُلۡنَا اضۡرِبْ بِّعَصَاكَ الۡحَجَرَ‌ؕ فَانۡفَجَرَتۡ مِنۡهُ اثۡنَتَا عَشۡرَةَ عَيۡنًا‌ ؕ قَدۡ عَلِمَ كُلُّ اُنَاسٍ مَّشۡرَبَهُمۡ‌ؕ كُلُوۡا وَاشۡرَبُوۡا مِنۡ رِّزۡقِ اللّٰهِ وَلَا تَعۡثَوۡا فِى الۡاَرۡضِ مُفۡسِدِيۡنَ ﴿۶۰﴾

आणि जेव्हा मूसा (अ.) ने आपल्या लोकांसाठी पाण्याची मागणी केली, तेव्हा आम्ही आज्ञा दिली की, आपली काठी दगडावर मार, ज्यातून बारा झरे वाहू लागले. प्रत्येक[६] घराण्याने आपले पाण्याचे ठिकाण माहित करून घेतले. (आणि आम्ही सांगून टाकले) अल्लाहतआलाने दिलेली रोजी खा व प्या. आणि पृथ्वीत फसाद करीत फिरू नका. ६०

(१) बहुतेक भाष्यकारांच्या मते ही वस्ती, म्हणजे (जेरूस्सलेम) बैतुल मुकद्दस आहे.

(२) काही भाष्यकारांनी सजदा म्हणजे झुकून दाखल व्हा, असा अर्थ घेतला आहे. तर काहींनी सजद-ए-शुक्र म्हणजे कृतज्ञतेने अल्लाहपुढे झुकणे असा अर्थ घेतला आहे.

(३) 'हित्ततून' चा अर्थ आमची पापे क्षमा करा.

(४) याची तपसील एका हदीस मध्ये आली आहे. जी हदीस मुस्लिम व बुखारी मध्ये आहे. नबी ﷺ नी म्हटले ''त्यांना हुकूम देण्यात आला होता की, सजदा करीत दाखल व्हा. परंतु ते आपल्या नितंबावर जमिनीवर घासत घासत दाखल झाले आणि आमची पापे क्षमा कर म्हणण्या ऐवजी, ''हब्बतुन फी शअरतिन्'' (म्हणजे गहू औंबी मध्ये) म्हणत राहिले. यावरून त्यांच्या खोडसळपणाची, जो त्यांच्यात निर्माण झाला होता, तसेच ईश आज्ञेची खिल्ली उडवण्याचा गुन्हा त्यांनी केला, याची कल्पना केली जाऊ शकते. वास्तव हे आहे की, जेव्हा एखादा समाज सद्चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या दृष्टीने अस्तंगत होतो, तेव्हा त्यांची वर्तणूक ईश आज्ञेबरोबर अशीच असते.

(५) ही आकाशातून उतरलेली शिक्षा कोणती होती ? काहींनी म्हटले

(१) अल्लाहचा प्रकोप

(२) सोसाट्याचे चक्रीवादळ

(३) महामारी. या शेवटच्या शिक्षेबाबत हदीसने ही पुष्टी होते. नबी ﷺ म्हणतात, ही महामारी त्या प्रकोपाचा भाग आहे, जो तुमच्यापूर्वी काही लोकांवर उतरविण्यात आला होता. तुमच्या उपस्थितीत जर महामारी कोठे सुरू झाली, तर तेथून निघून जाऊ नका. आणि तुम्हाला माहित झाले की, अमक्या परिसरात महामारी चालू आहे, तर तेथे जाऊ नका. (स.मुस्लिम)

(६) ही घटना काहींच्या मते ''तिह'' येथील आहे. आणि काहींच्या मते सीनाच्या वाळवंटातील आहे. तेथे पाण्याची गरज जेव्हा निर्माण झाली, तेव्हा अल्लाहतआलाने हजरत मूसा عليه السلام ला सांगितले की, आपली काठी दगडावर मार तात्काळ दगडातून बारा झरे वाहू लागले. घराणी सुद्धा बारा होती. प्रत्येक घराणे आपापल्या झऱ्यातून (पाणी पिऊन) तृप्त होत असे. हाही एक चमत्कार होता, जो अल्लाहतआलाने ह.मूसा عليه السلام च्या मार्फत प्रकट केला.

وَاِذْ قُلْتُمْ يٰمُوْسٰى لَنْ نَّصْبِرَ عَلٰى طَعَامٍ وَّاحِدٍ فَادْعُ لَنَا رَبَّكَ يُخْرِجْ لَنَا مِمَّا تُنْۢبِتُ الْاَرْضُ مِنْۢ بَقْلِهَا وَ قِثَّآئِهَا وَ فُوْمِهَا وَ عَدَسِهَا وَ بَصَلِهَا ؕ قَالَ اَتَسْتَبْدِلُوْنَ الَّذِىْ هُوَ اَدْنٰى بِالَّذِىْ هُوَ خَيْرٌ ؕ اِهْبِطُوْا مِصْرًا فَاِنَّ لَكُمْ مَّا سَاَلْتُمْ ؕ وَضُرِبَتْ عَلَيْهِمُ الذِّلَّةُ وَ الْمَسْكَنَةُ ۗ وَبَآءُوْ بِغَضَبٍ مِّنَ اللّٰهِ ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمْ كَانُوْا يَكْفُرُوْنَ بِاٰيٰتِ اللّٰهِ وَيَقْتُلُوْنَ النَّبِيّٖنَ بِغَيْرِ الْحَقِّ ؕ ذٰلِكَ بِمَا عَصَوْا وَّ كَانُوْا يَعْتَدُوْنَ ﴿٦١﴾

**आणि जेव्हा तुम्ही सांगितले की हे मूसा! आम्ही एकाच प्रकारच्या अन्नाला सतत सहन करू शकत नाही. म्हणून आपल्या पालनकर्त्यापाशी प्रार्थना करा की, तो आमच्यासाठी जमिनीच्या उत्पन्नातून आम्हाला भाजीपाला, काकडी, गहू, मसूर आणि कांदे देईन मूसा (अ.) ने म्हटले, तुम्ही उत्कृष्ट वस्तुंच्या ऐवजी निष्कृष्ट वस्तू का मागतात? ठीक आहे. शहरात जा जिथे तुम्हाला तुमच्या वांछित वस्तू मिळून जातील.[१] त्यांच्यावर अप्रतिष्ठा आणि दारिद्रय लादण्यात आले. आणि अल्लाहचा प्रकोप घेऊन ते परतले[२] असे यासाठी की ते अल्लाहच्या निशाण्यांना नाकारत होते, आणि पैगंबर लोकांचा नाहक[३] वध करीत होते. हा त्यांचा (अल्लाहचा) आदेश न मानण्याच्या खोडसाळपणाचा परिणाम आहे[४] ६१**

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَ الَّذِيْنَ هَادُوْا وَالنَّصٰرٰى وَالصّٰبِئِيْنَ مَنْ اٰمَنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ وَعَمِلَ صَالِحًا فَلَهُمْ اَجْرُهُمْ عِنْدَ رَبِّهِمْ ۚ وَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿٦٢﴾

**नि:संशय ज्यांनी ईमान आणले आणि जे यहूदी[५] असो, खिस्ती[६] असो, किंवा नक्षत्रपुजक[७], असो जो कोणीपण अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर ईमान आणीन, आणि सत्कृत्ये करील, त्याचा मोबदला त्याच्या पालनकर्त्यापाशी (सुरक्षित) आहे. त्यांना कुठलेही भय नाही आणि ते दु:खी[८] पण होणार नाही ६२**

وَاِذْ اَخَذْنَا مِيْثَاقَكُمْ وَ رَفَعْنَا فَوْقَكُمُ الطُّوْرَ ؕ خُذُوْا مَآ اٰتَيْنٰكُمْ بِقُوَّةٍ وَّاذْكُرُوْا مَا فِيْهِ لَعَلَّكُمْ تَتَّقُوْنَ ﴿٦٣﴾

**आणि जेव्हा आम्ही तुमच्या पासून वचन घेतले, आणि तुमच्यावर तूर पर्वत आणून उभा केला[९], (आणि म्हटले) जे आम्ही तुम्हास दिले आहे त्याला घट्टपणे धरून ठेवा, आणि जे काही यांत आहे, त्याला स्मरणात ठेवा, की तुम्ही (कदाचित नरकाग्नीपासून) वाचून जाल. ६३**

ثُمَّ تَوَلَّيْتُمْ مِّنْۢ بَعْدِ ذٰلِكَ ۚ فَلَوْلَا فَضْلُ اللّٰهِ عَلَيْكُمْ وَرَحْمَتُهٗ لَكُنْتُمْ مِّنَ الْخٰسِرِيْنَ ﴿٦٣﴾

**परंतु यानंतरही तुम्ही फिरून गेले. जर अल्लाहतआलाची कृपा व त्याची दया तुम्हावर नसती, तर तुम्ही नुकसान उचलणारे झाला असता ६४**

(१) हा प्रसंग ''तिह''च्या मैदानातील आहे. या ठिकाणी इजिप्त म्हणजे पूर्ण इजिप्त देश नसून फक्त कोणी एक शहर आहे. याचा अर्थ असा की, येथून कुठल्याही शहरात चालत जा आणि तेथे शेतीवाडी करा. आपल्या पंसतीचा भाजीपाला आणि डाळी उगवा आणि खा. असे यासाठी की त्यांनी अल्लाहच्या देणगीप्रती कृतघ्नता आणि शेखी दाखवली. यामुळे त्यांची अशी मागणी होती म्हणून त्यांना दटविण्यासाठी उपरोधिकपणे सांगितले गेले की तुमच्यासाठी तेथे मनोवांच्छिंत वस्तू आहेत...

(२) कुठे ते उपकार आणि इनाम ज्यांच्यावर चर्चा झाली आहे. आणि कुठे ती अप्रतिष्ठा व दारिद्रय जे त्यांच्यावर मागून लादण्यात आले, आणि ते अल्लाहच्या प्रकोपाचे धनी झाले. प्रकोपपण दयेप्रमाणे अल्लाहचे एक गुणवैशिष्ट्य आहे.

(३) ही अप्रतिष्ठा आणि अल्लाहच्या प्रकोपाचे कारण सांगितले जात आहे; की अल्लाहतआलाच्या, निशाण्यांना नाकारणे आणि अल्लाहतआलाकडे बोलाविणारे पैगंबर लोक عليهم السلام आणि सत्याचे आवाहन करणारे, यांचा वध करणे, त्यांना रूसवा व बेईज्जत करणे, हे अल्लाहच्या प्रकोपाला कारणीभूत आहे. काल यहूदी हे पातक करून प्रकोपीत आणि अप्रतिष्ठीत झाले. तर आज असे वर्तन करून कोण प्रिय आणि ताठ मानेने चालणारा होऊ शकेल? ''अयना मा कानू व् हैसो मा कानू'' (तो कोणीही असो आणि कोठेही असो.)

(४) हे अप्रतिष्ठा आणि दारिद्रय यांचे दुसरे कारण आहे 'असव' (नाफरमानी) चा अर्थ आहे, ज्या कामांच्या करण्याची त्यांना मनाई करण्यात आली होती, तीच कामे त्यांनी केली. आणि ''यअतदून'' चा अर्थ नेहमीच्या कामांत ते मर्यादेचे उल्लंघन करीत होते. मान्य करणे व आज्ञाधारकपणा हा आहे की 'मनहियात' पासून दूर राहिले जावे आणि 'मामूरात' अशा प्रकारे केले जावे, ज्याप्रमाणे त्यांना करण्याचा हुकूम दिला गेला आहे. आपल्याकडून कमी जास्त करणे हा आगाऊपणा (जियादती) ''एअ्तेदा'' आहे, जो अल्लाहतआलाला बिल्कुल पसंत नाही.

(५) यहूद ''हवादतून'' (प्रेमाच्या अर्थात), किंवा तहव्वूद (पश्चात्ताप व्यक्त करण्याच्या अर्थाने) बनला आहे.जणूं याचे हे नांव पश्चात्ताप व्यक्त करणारे किंवा एक दुसऱ्यावर प्रेम करण्यामुळे पडले. तथापि ह.मूसा ﷺ ला मानणाऱ्यांना यहूद म्हटले जाते.

(६) नसारा हे नुसरानचे बहुवचन आहे. जे नुसरत पासून निर्माण झाले आहे. ज्याचा अर्थ मदत करणारे असा आहे. आपसात एक दुसऱ्याची मदत करण्यामुळे यांचे हे नाव नसारा पडले. यांना अन्सारपण म्हटले जाते. जसे त्यांनी ह.ईसा ﷺ ला सांगितले होते ''नहनु अन्सारुल्लाह'' (आम्ही अल्लाहसाठी तुझी मदत करणारे आहोत). ह. ईसा (अ.) ला मानणाऱ्यांना ''नसारा'' म्हटले जाते. त्यांना ईसाईपण म्हणतात.

(७) साबीईन साबेयूनचे अनेकवचन आहे. हे लोक खचित्च सुरवातीला कुठल्यातरी सत्य धर्माला मानणारे राहिले असतील. याच्यासाठी कुरआनात यहूदी आणि ख्रिस्त्या बरोबर यांचा उल्लेख करण्यात आला आहे. नंतर यांच्यात देवदूत पुजा आणि नक्षत्र पुजा सुरू झाली, किंवा हे कुठल्याही धर्माला मानणारे राहिले नाहीत. याचसाठी ज्यांचा कोणताही धर्म नाही अशा लोकांना साबी म्हटले जाऊ लागले.

८) काही नव्या भाष्यकारांना, या महावाक्याचा अर्थ समजण्यात मोठी चूक झाली. आणि यामुळे त्यांनी सार्वभौमत्वाची (सर्व धर्म सम भाव) भावना रूढ करण्याचा प्रयत्न केला. म्हणजे याचा अर्थ असा घेतला की, मोहम्मद ﷺ वर ईमान आणणे जरूरी नाही. तथापि जो ज्या धर्माला मानतो व त्याप्रमाणे श्रध्दा बाळगतो आणि सत्कृत्ये करतो त्याला मोक्ष मिळून जाईल. हे तत्त्वज्ञान अगदी भटकवणारे आहे. या महावाक्याचे बरोबर भाष्य असे आहे की, जेव्हा अल्लाहतआलाने या पूर्वीच्या महावाक्यात यहूद्यांची दुष्कृत्यता आणि आडदांडपणामुळे प्रकोपास पात्र होण्याची चर्चा केली, तेव्हा संदेह निर्माण होऊ शकत होता. या यहूद्यांत जे लोक अल्लाहच्या खऱ्या पुस्तकाला (तौरातला) मानणारे आणि पैगंबरांच्या मार्गदर्शनानुसार, जीवन व्यतीत करणारे होते त्यांच्या बरोबर अल्लाहतआलाने काय मामला केला? किंवा काय मामला करणार आहे? अल्लाहतआलाने यांचे स्पष्टीकरण केले की, फक्त यहूदीच नव्हे तर, ख्रिस्ती आणि साबी सुद्धा आपापल्या काळी, ज्यांनी अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर ईमान आणले आणि सत्कृत्ये करीत राहीले ते सर्व परलोकात मोक्ष पावतील. आणि याचप्रमाणे आता मोहम्मद ﷺ पैगंबरांवर ईमान आणणारे मुसलमानही जर खरे पाहता अल्लाहवर व शेवटच्या (कयामतच्या) दिवसावर श्रध्दा ठेवल्यावर आणि सत्कृत्ये केल्यानंतर तर खचितच् हे पण परलोकाच्या हमेशा हमेशा राहणाऱ्या देणग्या मिळण्यास पात्र ठरतील. शेवटच्या मुक्तीत कोणाशी भेदाभेद केला जाणार नाही. तेथे निष्पक्षपाती निर्णय दिला जाईल. मग ते मुस्लीम असोत, किंवा रसूल आखरूज्जमाँ ﷺ च्या पूर्वी होऊन गेलेले, यहूदी, ईसाई आणि साबी वगैरे यांचे समर्थक. काही, सहाबा رضي الله عنه च्या कथनात येते उदा.मुजाहिद (رحمة الله عليه) म्हणतात की, ह.सलमान फारसी رضي الله عنه कथन करतात, ज्यात ते म्हणतात की, मी नबी ﷺ ना त्या धार्मिक लोकांबद्दल विचारले, जे माझ्याबरोबर होते. म्हणजे ह.मोहम्मद ﷺ ची पैगंबरी जाहीर होण्यापूर्वी आपल्या धर्माप्रमाणे आचरण करीत होते, तेव्हा या प्रसंगी हे महावाक्य अवतरीत झाले ''इन्नल्लजीना आमनू वल्लजीना हादू'' (इब्ने कसीर) कुरआन करीमच्या दुसऱ्या जागी याला आणखी समर्थन मिळते उदा.''इन्नद्दीना इंदल्लाहील इस्लाम'' (सू.आले इम्रान १९) (''अल्लाहजवळ धर्म फक्त इस्लामच आहे.'') ''जो इस्लाम शिवाय, दुसऱ्या कोण्या धर्माचा अभिलाषी असेल तो केव्हाही कबूल केला जाणार नाही.'' (सू. आले इम्रान ८५) आणि हदीस मध्ये सुद्धा नबी ﷺ नी स्पष्टीकरण करून दिले. ''आता माझ्या पैगंबरीवर ईमान आणल्याशिवाय कोणाही व्यक्तीला मुक्ती मिळू शकत नाही. शपथ त्या अल्लाहच्या जातची ज्याच्या कबजात माझा प्राण आहे. माझ्या या उम्मत मध्ये जी पण व्यक्ती माझ्याबद्दल ऐकेल, तो यहूदी असो का ईसाई (आणि) मग तो माझ्यावर ईमान आणणार नाही तर तो नरकाग्नीत जाईल'' (सही मुस्लिम किताबुल ईमान) याचा अर्थ असा की सर्व धर्म समभावाचे आडमार्गी भटकविणारे तत्त्वज्ञान, दुसऱ्या कुरआनी महावाक्यांनी दृष्टीआड करण्याचा परिणाम आहे. तसेच हदीसशिवाय कुरआनाला समजण्याचा प्रयत्न करणे, हेही याचे कारण आहे. त्यामुळे हे म्हणणे अगदी सत्य आहे की सही हदीसशिवाय कुरआनला समजले जाऊ शकत नाही.

(९) जेव्हा यहूद्यांनी खोडसळपणाने तौरात मध्ये आलेल्या आदेशाबाबत म्हटले की, आमच्याने या आदेशांची अंमलबजावणी होऊ शकणार नाही. तेव्हा अल्लाहतआलाने तूर पर्वताला छत्रीसारखे त्यांच्यावर करून दिले. ज्याला भिऊन त्यांनी आदेशांची अंमलबजावणी करण्याचे वचन दिले.

وَلَقَدْ عَلِمْتُمُ الَّذِيْنَ اعْتَدَوْا مِنْكُمْ فِي السَّبْتِ فَقُلْنَا
لَهُمْ كُوْنُوْا قِرَدَةً خٰسِئِيْنَ ﴿٦٥﴾

आणि खचितच ते लोकही तुम्हाला ठाऊक आहे ज्यांनी सब्तच्या[१]
(शनिवारच्या) बाबतीत मर्यादेचे उल्लंघन केले, आणि आम्हीही सांगून
टाकले, तुम्ही धुतकारलेली माकडे बनून जा. ६५

فَجَعَلْنٰهَا نَكَالًا لِّمَا بَيْنَ يَدَيْهَا وَمَا خَلْفَهَا وَمَوْعِظَةً
لِّلْمُتَّقِيْنَ ﴿٦٦﴾

याला आम्ही पूर्वीच्या आणि नंतरच्या लोकांसाठी धडा बनवून दिला,
आणि जे अल्लाहला भितात त्यांच्यासाठी धार्मिक उपदेश बनवून दिला ६६

وَاِذْ قَالَ مُوْسٰى لِقَوْمِهٖٓ اِنَّ اللّٰهَ يَاْمُرُكُمْ اَنْ تَذْبَحُوْا
بَقَرَةً ؕ قَالُوْٓا اَتَتَّخِذُنَا هُزُوًا ؕ قَالَ اَعُوْذُ بِاللّٰهِ اَنْ
اَكُوْنَ مِنَ الْجٰهِلِيْنَ ﴿٦٧﴾

आणि ह.मूसा (अ.) ने जेव्हा आपल्या लोकांना म्हटले की,
अल्लाहतआला तुम्हाला एक गाय जबह करण्याचा हुकूम देत आहे[२].
तेव्हा ते म्हणाले की (तुम्ही) आमची थट्टा का करीत आहात? त्यांनी
(ह.मूसा.अ. ने) म्हटले मी असा जाहिल (नादान) होण्यापासून
अल्लाहतआलाचा आश्रय मागतो. ६७

قَالُوا ادْعُ لَنَا رَبَّكَ يُبَيِّنْ لَّنَا مَا هِيَ ؕ قَالَ اِنَّهٗ يَقُوْلُ
اِنَّهَا بَقَرَةٌ لَّا فَارِضٌ وَّلَا بِكْرٌ ؕ عَوَانٌ بَيْنَ ذٰلِكَ ؕ
فَافْعَلُوْا مَا تُؤْمَرُوْنَ ﴿٦٨﴾

त्यांनी म्हटले हे मूसा(अ.)! प्रार्थना करा की, अल्लाहतआला या
बाबतीत आम्हाला खुलासा करून देईन (मूसा अ. ने) म्हटले ऐका, ही
गाय म्हातारी नसावी, व वासरू पण नसावी, या मधल्या वयाची तरूण
असावी, आता तुम्हास जो हुकूम दिला गेला आहे त्याची
अंमलबजावणी करा. ६८

قَالُوا ادْعُ لَنَا رَبَّكَ يُبَيِّنْ لَّنَا مَا لَوْنُهَا ؕ قَالَ اِنَّهٗ
يَقُوْلُ اِنَّهَا بَقَرَةٌ صَفْرَآءُ ۙ فَاقِعٌ لَّوْنُهَا تَسُرُّ
النّٰظِرِيْنَ ﴿٦٩﴾

ते पुन्हा म्हणू लागले की प्रार्थना करा की अल्लाहतआला ने सांगावे की,
गाईचा रंग कसा असावा ? मूसा (अ.) ने सांगितले की अल्लाह म्हणतो
की ती गाय जर्द पिवळ्या रंगाची असावी. तजेलदार आणि
पाहणाऱ्यांना सुंदर वाटेल असा तिचा रंग असावा. ६९

قَالُوا ادْعُ لَنَا رَبَّكَ يُبَيِّنْ لَّنَا مَا هِيَ ۙ اِنَّ الْبَقَرَ تَشٰبَهَ
عَلَيْنَا ؕ وَاِنَّآ اِنْ شَآءَ اللّٰهُ لَمُهْتَدُوْنَ ﴿٧٠﴾

ते म्हणू लागले की आपल्या पालनकर्त्याकडे आणखी प्रार्थना करा की,
तो आम्हाला आणखी खुलासा करीन, कारण या प्रकारच्या गायीतर
पुष्कळच आहेत. निवड करता येत नाही. जर अल्लाह इच्छील तर
आम्ही मार्गदर्शन प्राप्त करणारे होऊन जाऊ. ७०

قَالَ اِنَّهٗ يَقُوْلُ اِنَّهَا بَقَرَةٌ لَّا ذَلُوْلٌ تُثِيْرُ الْاَرْضَ
وَلَا تَسْقِي الْحَرْثَ ۚ مُسَلَّمَةٌ لَّا شِيَةَ فِيْهَا ؕ قَالُوا الْـٰٔنَ ٨ ع١٠ ٨
جِئْتَ بِالْحَقِّ ؕ فَذَبَحُوْهَا وَمَا كَادُوْا يَفْعَلُوْنَ ﴿٧١﴾

(मूसा अ.) ने म्हटले, अल्लाह म्हणतो की, ती गाय काम करणारी
नसावी.जमिनीत नांगर चालवणारी आणि शेतांना पाणी देणारी
नसावी. ती धष्टपुष्ट असावी, आणि ऐबदार नसावी. ते म्हणाले, आता
८ ع१० ८ तुम्ही सत्य सत्य खुलासा करून दिला. जणू ते आदेश पालनाला तयार
नव्हते, परंतु त्यांनी आदेश मान्य केला आणि ती गाय जबह[३] केली ७१

(१) सब्त (शनिवारच्या) द्विवशी यहूद्यांना माशांची शिकार करण्यास, तसेच कुठलेही ऐहिक काम करण्यास मनाई करण्यात आली होती. परंतु त्यांनी हीला बहाना करून अल्लाहच्या आद्वेशांचे उल्लंघन केले. शनिवारच्या द्विवशी त्यांची परीक्षा घेण्यासाठी मासे भरपूर येत, त्यांनी खड्डे खोदून ठेवले. की त्यात माश्यांनी अडकून राहावे. मग त्यांना रविवारच्या द्विवशी ते पकडून घेत.

(२) बनी इस्राईलमध्ये एक श्रीमंत निपुत्रिक माणूस होता. त्याचा वारस फक्त एक पुतण्या होता. एका रात्री या पुतण्याने आपल्या काकाचा खून करून, त्यांचे प्रेत कोण्या माणसाच्या द्वारासमोर टाकून द्विले, सकाळी खुन्याचा शोध घेतांना एक द्रुसऱ्याला जबाबद्वार ठरवू लागले. शेवटी ही गोष्ट ह.मूसा عليه السلام पर्यंत पोहचली, तेव्हा त्यांना एक गाय जबह करण्याचा हुकूम झाला. (जबह केलेल्या) गायीच्या एका अंगाने ज्याचा खून झाला होता. (त्याच्या प्रेताला) स्पर्श करण्यात आला, ज्यामुळे तो जिवंत झाला आणि खुन्याची ओळख पटवून पुन्हा मृत्यू पावला.

(३) त्यांना हुकूम द्वेण्यात आला होता की, एक गाय जबह करा. त्यांनी कोणतीही एक गाय जबह केली असती, तर अल्लाहच्या आद्वेशाचे पालन झाले असते. परंतु त्यांनी सरळ सरळ अंमलबजावणी करण्याऐवजी त्यात तृटी काढू लागले, आणि निरनिराळे प्रश्न विचारू लागले, त्यावर अल्लाहतआला पण त्यांच्यावर सक्ती करत गेला. म्हणून धर्मात नाहक वादविवाद करण्याला व सक्ती अंगिकारण्याला मनाई केली गेली आहे.

وَإِذْ قَتَلْتُمْ نَفْسًا فَادَّارَءْتُمْ فِيهَا ۖ وَاللَّهُ مُخْرِجٌ مَّا كُنتُمْ تَكْتُمُونَ ﴿٧٢﴾

जेव्हा तुम्ही एका माणसाचा वध केला मग त्यात वाद विवाद करू लागले आणि तुमच्या गुप्ततेला अल्लाहतआला उघड करणार होता[१].(७२)

فَقُلْنَا اضْرِبُوهُ بِبَعْضِهَا ۚ كَذَٰلِكَ يُحْيِي اللَّهُ الْمَوْتَىٰ وَيُرِيكُمْ آيَاتِهِ لَعَلَّكُمْ تَعْقِلُونَ ﴿٧٣﴾

आम्ही सांगितले की या गायीच्या एका तुकड्याने प्रेताच्या शरीराला स्पर्श करा (तो जिवंत होऊन जाईल) अशा प्रकारे अल्लाह मृतांना जिवंत करून तुम्हाला तुमच्या समजण्यासाठी आपल्या निशाण्या दाखवत असतो[२].(७३)

ثُمَّ قَسَتْ قُلُوبُكُم مِّن بَعْدِ ذَٰلِكَ فَهِيَ كَالْحِجَارَةِ أَوْ أَشَدُّ قَسْوَةً ۚ وَإِنَّ مِنَ الْحِجَارَةِ لَمَا يَتَفَجَّرُ مِنْهُ الْأَنْهَارُ ۚ وَإِنَّ مِنْهَا لَمَا يَشَّقَّقُ فَيَخْرُجُ مِنْهُ الْمَاءُ ۚ وَإِنَّ مِنْهَا لَمَا يَهْبِطُ مِنْ خَشْيَةِ اللَّهِ ۗ وَمَا اللَّهُ بِغَافِلٍ عَمَّا تَعْمَلُونَ ﴿٧٤﴾

यानंतर तुमची अंत:करणे दगडासारखी कठोर किंवा त्यापेक्षाही जास्त कठीण झाली[३] काही दगडांतून तर झरे वाहू लागतात, आणि (काही दगड) फुटून जातात आणि त्यांच्यातून पाणी निघून येते. आणि काही अल्लाहच्या भयाने तुकडे होऊन पडतात[४] आणि तुम्ही अल्लाहतआलाला आपल्या कर्मांकडून गाफिल समजू नका(७४)

(१) ही खुनाची तीच घटना आहे, ज्याकरीता बनी इस्राईलला गाय जबह करण्याचा हुकूम दिला गेला होता. आणि अशाप्रकारे अल्लाहने या खुनाचे गुपित उघड करून दिले, जरी तो खून रात्रीच्या अंधारात लोकांपासून लपवून केला गेला होता याचा अर्थ असा की, पाप किंवा पुण्य तुम्ही कितीही लपवून करा अल्लाह त्याला जाणतो. आणि अल्लाहतआला त्याला लोकात जाहीर करण्यास समर्थ आहे. याकरीता एकांत असो किंवा जाहीररित्या असो. प्रत्येक वेळी प्रत्येक ठिकाणी सत्कृत्येच करा, कारण कधी ती जाहीरपण होऊन जातील व लोकांना ठाऊकपण होऊन जातील, तर लाजीरवाणे वाटणार नाही. उलट त्याचा मानमर्तब आणि प्रतिष्ठेत वाढच होईल. आणि पाप कितीही लपवून केले, तरी ते उघड होण्याची शक्यता आहे. ज्यामुळे माणसाची बदनामी व कमीपणा आणि अप्रतिष्ठा होते.

(२) वधित माणसाच्या दुसऱ्यांदा जिवंत होण्याला प्रमाण ठरवून अल्लाहतआला कयामतच्या दिवशी सर्व माणसांना दुसऱ्यांदा जिवंत करण्याचे आपले सामर्थ्य जाहीर करतो. कयामतच्या दिवशी दुसऱ्यांदा मृतांना जिवंत करणे, कयामत नाकारणाऱ्यांसाठी नेहमीच आश्चर्याला कारणीभूत राहिले आहे. याकरीता अल्लाहतआलाने या गोष्टीचा कुरआन करीममध्ये जागोजागी वेगवेगळ्या ढंगाने उल्लेख केला आहे. सू.बकर: मध्येच अल्लाहतआलाने यांची पाच उदाहरणे दिली आहेत. एक उदाहरण ''सुम्मा-ब-अ्सनाकुम् मीमबाअदी मौतीकुम्'' (सू.बकर: ५६) (मग तुमच्या मरणानंतर आम्ही तुम्हास जिवंत करून उठविले), 'येऊन चुकले आहे. दुसरे उदाहरण हाच मृत्यू आहे. तिसरे उदाहरण सू. बक़र: महावाक्य क्र.२४३'' मूतू सुम्मा अहयाहुम (अल्लाहने त्यांना म्हटले) की मरा व ते मरून गेले नंतर (अल्लाहने त्यांना जिवंत केले) चौथे उदाहरण महावाक्य क्र.२५९ ''फ अमातहुल्लाहो मिअता आमिन सुम्माबअसहू '' अल्लाहतआलाने त्याला शंभर वर्षांचा मृत्यू दिला व पुन्हा जिवंत केले'' आणि पाचवे उदाहरण याच्यानंतरच्या महावाक्यात ह.इब्राहम عليه السلام चे चार पक्ष्यांचे आहे.

(३) म्हणजे मागील चमत्कार, आणि ती ताजी घटना की खून झालेला माणूस दुसऱ्यांदा जिवंत झाला, हे पाहून सुद्धा तुमच्या मनात ''इनाबत इलल्लाह'' ची इच्छा आणि पश्चात्ताप व माफी मागण्याची इच्छा होत नाही. उलट तुमची अंत:करणे दगडासारखी कठीण किंबहुना त्याहूनही जास्त कठीण होऊन गेली. अंत:करणाचे कठीण होऊन जाणे, हे व्यक्तींना आणि समाजाला तबाह व बर्बाद करणारे, आहेत तसेच याची निशानी ही आहे की अंत:करणांची जाणीव होण्याची क्षमता हिरावून घेतली गेली आहे. आणि सत्याला कबूल करण्याची क्षमता पण संपलेली आहे. यानंतर सुधारण्याची शक्यता कमी आणि संपूर्ण बरबादीचा अंदेशा जास्त असतो. यासाठी ईमानवाल्यांना खास करून ताकीद दिली गेली आहे की ''अहले ईमानने त्या लोकांसारखे न होऊन जावे, ज्यांना यांच्यापूर्वी पुस्तक दिले गेले होते, परंतु एक काळ निघून गेल्यावर त्यांची अंत:करणे कठीण होऊन गेली'' (सू. अल-हदीद-१६)

(४) या नंतर दगडांच्या काठिण्यानंतर सुद्धा, त्यांच्यापासून जे जे फायदे मिळतात आणि ज्या परिस्थितीतून ते पसार होतात त्यांचे वर्णन आहे. यावरून माहित झाले की, दगडांमध्ये सुद्धा एक प्रकारची बुद्धीमत्ता आणि जाणिव आहे. ज्याप्रमाणे अल्लाहतआलाचे फरमान आहे, ''तर आकाशात व पृथ्वीत आणि जे पण त्यांच्यात आहे ते सर्व त्याचेच गुणगाण करतात. अशी कोणतीही वस्तू नाही जी पावित्र्य आणि स्तुतीबरोबर त्यांचे स्मरण करीत नसेल. होय हे बरोबर आहे की, तुम्ही त्यांच्या गुणगाणाला समजू शकत नाही.'' (सू. बनी इस्राईल ४४) आणखी तपशिलासाठी सू.बनी इस्राईल महावाक्य ४४ चा तीन क्र. चा समास पहावा.

أَفَتَطْمَعُونَ أَن يُؤْمِنُوا لَكُمْ وَقَدْ كَانَ فَرِيقٌ مِّنْهُمْ يَسْمَعُونَ كَلَامَ اللَّهِ ثُمَّ يُحَرِّفُونَهُ مِن بَعْدِ مَا عَقَلُوهُ وَهُمْ يَعْلَمُونَ ﴿٧٥﴾

(मुस्लिमांनो!) काय तुमची इच्छा ही आहे की, हे लोक ईमानदार होऊन जावे. वास्तविक पाहता त्यांच्यात असे लोक सुद्धा आहेत, जे अल्लाहच्या वाणीला ऐकून बुद्धीवान आणि ज्ञानी असताना सुद्धा, (अल्लाहच्या वाणीला) बदलून टाकत असतात[१] (७५)

وَإِذَا لَقُوا الَّذِينَ آمَنُوا قَالُوا آمَنَّا وَإِذَا خَلَا بَعْضُهُمْ إِلَىٰ بَعْضٍ قَالُوا أَتُحَدِّثُونَهُم بِمَا فَتَحَ اللَّهُ عَلَيْكُمْ لِيُحَاجُّوكُم بِهِ عِندَ رَبِّكُمْ ۚ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿٧٦﴾

जेव्हा ईमानवाल्यांना भेटतात, तेव्हा आपली ईमानदारी त्यांच्यावर जाहीर करतात[२]. आणि जेव्हा आपसात भेटतात, तेव्हा म्हणतात की, तुम्ही मुस्लिमांना त्या गोष्टी का सांगतात? ज्या तुम्हाला अल्लाहतआलाने शिकविल्या आहेत. काय तुम्ही जाणत नाही की, हे तर अल्लाहतआलाजवळ तुमच्यावर पुराव्याचे कारण होऊन जाईल (७६)

أَوَلَا يَعْلَمُونَ أَنَّ اللَّهَ يَعْلَمُ مَا يُسِرُّونَ وَمَا يُعْلِنُونَ ﴿٧٧﴾

काय यांना ठाऊक नाही की, अल्लाह त्यांच्या गुप्त (वार्ता) आणि जाहीर गोष्टी सर्वांना जाणतो[३]. (७७)

وَمِنْهُمْ أُمِّيُّونَ لَا يَعْلَمُونَ الْكِتَابَ إِلَّا أَمَانِيَّ وَإِنْ هُمْ إِلَّا يَظُنُّونَ ﴿٧٨﴾

यांच्यातून काही निरक्षर (अडाणी) असेपण आहेत की, ते पुस्तकांच्या जाहीर शब्दांनाच फक्त जाणतात; आणि फक्त कल्पनाच लढवीत असतात.[४] (७८)

فَوَيْلٌ لِّلَّذِينَ يَكْتُبُونَ الْكِتَابَ بِأَيْدِيهِمْ ثُمَّ يَقُولُونَ هَٰذَا مِنْ عِندِ اللَّهِ لِيَشْتَرُوا بِهِ ثَمَنًا قَلِيلًا ۖ فَوَيْلٌ لَّهُم مِّمَّا كَتَبَتْ أَيْدِيهِمْ وَوَيْلٌ لَّهُم مِّمَّا يَكْسِبُونَ ﴿٧٩﴾

या लोकांसाठी दु:खाची गोष्ट आहे, जे आपल्या हाताने लिहिलेल्या पुस्तकाला (हे) अल्लाहकडून आहे, असे म्हणतात आणि अशा प्रकारे दुनियेचे (क्षुल्लक) फायदे मिळवितात. त्यांच्या हाताच्या लिखाणाच्या आणि त्यांच्या असल्या कमाईला हलाकत (म्हणजे दु:ख) होय. आणि खेद होय[५] (७९)

وَقَالُوا لَن تَمَسَّنَا النَّارُ إِلَّا أَيَّامًا مَّعْدُودَةً ۚ قُلْ أَتَّخَذْتُمْ عِندَ اللَّهِ عَهْدًا فَلَن يُخْلِفَ اللَّهُ عَهْدَهُ ۖ أَمْ تَقُولُونَ عَلَى اللَّهِ مَا لَا تَعْلَمُونَ ﴿٨٠﴾

हे लोक सांगतात की, आम्ही काही थोड्या दिवसांसाठी नरकाग्नीत राहू. त्यांना विचारा, काय तुमच्यापाशी अल्लाहतआलाचा एखादा परवाना[६] आहे? जर यांच्याजवळ असा (परवाना) असेल, तर अल्लाहतआला मुळीच आपल्या वचनाच्या विरूद्ध करणार नाही. किंबहुना तुम्ही अल्लाहकडे अशा गोष्टी[७] लावतात ज्यांना तुम्ही जाणत नाही. (८०)

بَلَىٰ مَن كَسَبَ سَيِّئَةً وَأَحَاطَتْ بِهِ خَطِيئَتُهُ فَأُولَٰئِكَ أَصْحَابُ النَّارِ ۖ هُمْ فِيهَا خَالِدُونَ ﴿٨١﴾

खचितच ज्यानेपण वाईट कर्मे केली; आणि तो आज्ञाभंजनात लिप्त आहे हे लोक नर्कवासी आहेत आणि ते नेहमीसाठी तेथेच राहतील (८१)

وَالَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ أُولَٰئِكَ أَصْحَابُ الْجَنَّةِ ۖ هُمْ فِيهَا خَالِدُونَ ﴿٨٢﴾

आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कामे केली, ते स्वर्गवासी आहेत, आणि स्वर्गात नेहमी राहतील[८] (८२)

وَإِذْ أَخَذْنَا مِيثَاقَ بَنِي إِسْرَائِيلَ لَا تَعْبُدُونَ إِلَّا اللَّهَ وَبِالْوَالِدَيْنِ إِحْسَانًا وَذِي الْقُرْبَىٰ وَالْيَتَامَىٰ وَالْمَسَاكِينِ وَقُولُوا لِلنَّاسِ حُسْنًا وَأَقِيمُوا الصَّلَاةَ وَآتُوا الزَّكَاةَ ثُمَّ تَوَلَّيْتُمْ إِلَّا قَلِيلًا مِّنكُمْ وَأَنتُم مُّعْرِضُونَ ﴿٨٣﴾

आणि जेव्हा आम्ही बनी इस्राईलकडून वचन घेतले की, अल्लाहशिवाय इतरांची उपासना करू नये; आणि आई बापांबरोबर चांगली वर्तणूक ठेवावी. त्याचप्रमाणे नातेवाईकांशी, अनाथांशी आणि गरीब लोकांशी (पण चांगली वर्तणूक ठेवावी) आणि लोकांना चांगल्या गोष्टी सांगाव्यात. नमाजीला वेळच्या वेळी नेहमी (कायम) पढावे. आणि जकात देत रहावी. परंतु थोड्या लोकांशिवाय तुम्ही सर्व फिरून गेला, आणि विन्मुख झालात (८३)

१) ईमानवाल्यांना संबोधित करून, यहूद्यांच्या बाबतीत सांगण्यात येत आहे की, काय तुम्हाला त्यांच्या ईमान आणण्याची आशा आहे ? वास्तविक त्यांच्या मागील लोकांत, एक समूह असाही होता, जो अल्लाहच्या वाणीमध्ये, जाणून बुझून फेरफार (शाब्दिक आणि आर्थिक) करत होता. हा त्याचा प्रयत्न अल्लाहच्या वाणीला नाकारणारा

आहे. अशा लोकांची ईमान आणण्याची सुतराम शक्यता नाही. याचा अर्थ असा की, जे लोक ऐहिक फायद्यासाठी किंवा समूहाच्या द्वेषापोटी अल्लाहच्या वाणीत फेरबदल करण्यास मागेपुढे पाहत नाही; ते गुमराहीच्या दलदलमध्ये असे फसून जातात की, त्यातून निघू शकत नाही. उम्मते मोहम्मदियाचे पुष्कळ धर्मपंडीत, विद्वान आणि बुजूर्ग लोक सुद्धा दुर्दैवाने कुरआन व हदीसमध्ये हेरफेर करण्याचा गुन्हा करीत आहे. अल्लाहतआला या गुन्ह्यापासून सुरक्षित ठेवो (आमीन)! (कृपया सू. निसा महावाक्य ७७ चे भाष्य पहा)

२) येथे काही यहूद्यांच्या ढोंगी चालीचा पर्दाफाश केला जात आहे, की ते मुस्लिमांमध्ये तर आपल्या ईमान आणण्याचा ढिंडोरा पिटत असत. परंतु जेव्हा आपसात भेटत, तेव्हा एक दुसऱ्याची या गोष्टीवर निर्भत्सना करीत की, तुम्ही आपल्या पुस्तकाच्या अशा गोष्टी मुस्लिमांना का दाखवतात ? ज्यामुळे रसूलेअरबी ﷺ ची सत्यता जाहीर होते. अशाप्रकारे तुम्ही स्वत: एक असा सज्जड पुरावा, त्यांचे हाती देत आहात जो तुमच्या विरूद्ध अल्लाहच्या दरबारी ते रूजू करतील.

३) अल्लाहतआलाने म्हटले, तुम्ही दाखवा अगर न दाखवा अल्लाहला तर प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे आणि तो या गोष्टींना तुम्ही दाखविल्याशिवाय सुद्धा मुस्लिमांवर प्रकट करू शकतो.

४) या तर त्यांच्या ज्ञानी लोकांच्या गोष्टी होत्या. राहिले त्यांचे अडाणी निरक्षर, जे तौरात पासून अनभिज्ञ आहेत. परंतु ते इच्छा जरूर बाळगतात; आणि अटकळ पंचीवर चालतात; ज्यात त्यांच्या धर्मपंडीतांनी त्यांना व्यस्त करून ठेवले आहे. उदा. आम्ही तर अल्लाहचे लाडके आहोत, आम्ही जर नरकाग्नीत गेलो तरी सुद्धा थोड्या दिवसांसाठी. आम्हाला आमचे बुजूर्ग लोक वाचवून घेतील वगैरे. जसे आजसुद्धा अडाणी मुस्लिमांना, धर्मपंडीत आणि बुजुर्गांनी सुदंर जाळ्यात व धोकादायक वायद्यात अडकवून ठेवले आहे.

५) हा यहूद्यांचा धिटपणा आणि ईशभयापासून निरपेक्षतेचा खुलासा आहे की, आपल्या हातून धार्मिक बाबी (मसले) बनवतात. आणि डंक्याच्या चोटने, सांगतात की, हे अल्लाहकडून आहे. हदीसीप्रमाणे ''वैल'' ही नरकाची एक दरी आहे, तिची खोली एवढी आहे की एका काफिराला तिच्या तळापर्यंत पोहचण्याला ४० वर्षे लागतील. (अहमद तिरमिझी, इब्ने हिब्बान व हाकीम, फत्हुल कदीरच्या हवाल्याने)

काही धर्मपंडीतांनी या महावाक्याने कुरआन मजीदच्या विक्रीला अयोग्य ठरविले आहे. परंतु हे म्हणणे बरोबर नाही. महावाक्याचा रोश, त्याच लोकांकडे आहे; जे ऐहिक फायदा मिळविण्यासाठी ईशवाणीत फेरबदल करतात आणि लोकांना धर्माच्या नावावर फसवतात.

६) यहूदी म्हणत होते की, या जगाचे वय सातहजार वर्षे आहे. आणि आम्ही एक हजार वर्षाच्या बदल्यात एक दिवस नरकाग्नीत राहू. या हिशेबाने फक्त सात दिवस नरकाग्नीत राहू, काही म्हणत असत की, आम्ही चाळीस दिवस वासरांची पुजा केली होती. आम्ही चाळीस दिवस नरकाग्नीत राहू. अल्लाहतआलाने म्हटले, काय तुम्ही अल्लाहकडून वचन घेतले आहे? हे वक्तव्यपण नाकारणारे आहे. म्हणजे हे चुकीचे सांगत आहे. अल्लाहतआलाबरोबर असा कुठलाही करार मदार नाही.

७) म्हणजे तुमचा हा दावा की, आम्ही जरी नरकाग्नीमध्ये गेलो, तरी फक्त थोड्या दिवसांसाठीच जाऊ. अशा गोष्टी तुमच्या कडून आहेत. अशा रीतीने तुम्ही अल्लाहकडे अशा गोष्टी लावतात; ज्याचे, तुम्हा स्वत:ला काहीही ज्ञान नाही. यापुढे अल्लाहतआला आपले तत्त्व सांगत आहे की, ज्याच्या अनुषंगाने कयामतच्या दिवशी, पुण्यवानांना आणि पापी जनांना त्यांच्या पुण्याची व पापाची बक्षिसी व शिक्षा दिली जाईल.

८) हे, यहूद्यांच्या दाव्याचे खंडन करून स्वर्गात आणि नरकात जाण्याचे तत्त्व वर्णन करण्यात येत आहे. ज्यांच्या कर्मपत्रात पापच पाप असेल, म्हणजे कुफ्र आणि शिर्क (की हे अंगिकारण्यामुळे, तर काही सत्कृत्ये पण केली असतील, तर ती सुद्धा फलद्रुप होणार नाही.) तर असे लोक नेहमीसाठी नरकाग्नीत राहतील. आणि जे ईमान व सत्कृत्यांनी श्रृंगारित (मुत्तसिफ) असतील ते स्वर्गवासी आणि जे मोमिन (विश्वासू) गुन्हेगार असतील, त्यांचा मामला अल्लाहतआलाकडे राहील. तो इच्छेल तर आपल्या कृपेने त्यांच्या पापांना क्षमा करून टाकेन किंवा शिक्षा म्हणून काही काळ नरकाग्नीत ठेवून,किंवा नबी ﷺ च्या शफाअतीमुळे त्यांना स्वर्गात दाखल करून देईल जसे, या गोष्टी सही हदीसने सिद्ध आहेत. आणि अहले सुन्नतची तशी श्रद्धा (अकीदा) आहे.

وَاِذْ اَخَذْنَا مِيْثَاقَكُمْ لَا تَسْفِكُوْنَ دِمَآءَكُمْ وَلَا تُخْرِجُوْنَ اَنْفُسَكُمْ مِّنْ دِيَارِكُمْ ثُمَّ اَقْرَرْتُمْ وَاَنْتُمْ تَشْهَدُوْنَ ﴿٨٤﴾

आणि जेव्हा आम्ही तुमच्या कडून वचन घेतले की आपसात रक्तपात करू नये आणि आपल्याच लोकांना तडीपार न करणे, तुम्ही (हे) मान्य केले आणि तुम्ही याचे साक्षीदार[१] राहिले ८४

ثُمَّ اَنْتُمْ هٰٓؤُلَآءِ تَقْتُلُوْنَ اَنْفُسَكُمْ وَتُخْرِجُوْنَ فَرِيْقًا مِّنْكُمْ مِّنْ دِيَارِهِمْ ز تَظٰهَرُوْنَ عَلَيْهِمْ بِالْاِثْمِ وَالْعُدْوَانِ ط وَاِنْ يَّاْتُوْكُمْ اُسٰرٰى تُفٰدُوْهُمْ وَهُوَ مُحَرَّمٌ عَلَيْكُمْ اِخْرَاجُهُمْ ط اَفَتُؤْمِنُوْنَ بِبَعْضِ الْكِتٰبِ وَتَكْفُرُوْنَ بِبَعْضٍ ج فَمَا جَزَآءُ مَنْ يَّفْعَلُ ذٰلِكَ مِنْكُمْ اِلَّا خِزْيٌ فِى الْحَيٰوةِ الدُّنْيَا ج وَيَوْمَ الْقِيٰمَةِ يُرَدُّوْنَ اِلٰٓى اَشَدِّ الْعَذَابِ ط وَمَا اللّٰهُ بِغَافِلٍ عَمَّا تَعْمَلُوْنَ ﴿٨٥﴾

परंतु तरी सुद्धा तुम्ही आपसांत रक्तपात केला आणि आपल्यातल्या एका गटाला हद्दपार केले. आणि पाप व जबरदस्तीच्या बाबतीत त्यांच्या विरूद्ध दुसऱ्यांची बाजू घेतली. हां, परंतु जेव्हा ते कैदी बनून तुमच्याकडे आले, तेव्हा त्यांचे प्राणमूल्य (फिदया) अदा केले. परंतु त्यांना हद्दपार करणे, जे निषिद्ध होते, (त्याचा काही विचार केला नाही) काय काही आदेशांवर ईमान आणतात आणि काहींना नाकारतात[२]? तुमच्यातून जो कोणी असे करीन, त्याची शिक्षा याशिवाय काय आहे की या जगात फटफजिती आणि कयामतच्या दिवशी कडक शिक्षेचा मार, आणि अल्लाहतआला तुमच्या कर्मांपासून बेखबर नाही ८५

اُولٰٓئِكَ الَّذِيْنَ اشْتَرَوُا الْحَيٰوةَ الدُّنْيَا بِالْاٰخِرَةِ ز فَلَا يُخَفَّفُ عَنْهُمُ الْعَذَابُ وَلَا هُمْ يُنْصَرُوْنَ ﴿٨٦﴾ ع ١٠

हे ते लोक आहेत, ज्यांनी ऐहिक जीवनाला परलोकाच्या ऐवजी विकत घेतले आहे. त्यांच्यावरून शिक्षा हलकी केली जाणार नाही; आणि त्यांना कुठल्याही प्रकारचे सहाय्य केले जाणार नाही[३]. ८६

وَلَقَدْ اٰتَيْنَا مُوْسَى الْكِتٰبَ وَقَفَّيْنَا مِنْۢ بَعْدِهٖ بِالرُّسُلِ ز وَاٰتَيْنَا عِيْسَى ابْنَ مَرْيَمَ الْبَيِّنٰتِ وَاَيَّدْنٰهُ بِرُوْحِ الْقُدُسِ ط اَفَكُلَّمَا جَآءَكُمْ رَسُوْلٌۢ بِمَا لَا تَهْوٰٓى اَنْفُسُكُمُ اسْتَكْبَرْتُمْ ج فَفَرِيْقًا كَذَّبْتُمْ ز وَفَرِيْقًا تَقْتُلُوْنَ ﴿٨٧﴾

आम्ही ह.मूसा (अ.) ला पुस्तक दिले, त्यांच्यानंतर आम्ही आणखी पैगंबरपण पाठविले आणि आम्ही ह.ईसा बिन मर्यम (अ.) ला ढळढळीत चमत्कार दिले आणि रूहुल कुदुस (जिब्राईल अ.) द्वारे त्यांचे समर्थन केले[४]. परंतु जेव्हा कधी पैगंबर लोक तुमच्यापाशी ती वस्तू घेऊन आले, जी तुमच्या इच्छेविरूद्ध होती. तर तुम्ही गर्वात आलात, काहींना तर तुम्ही खोटे ठरविले आणि काहींचा तर वध पण केला[५]. ८७

وَقَالُوْا قُلُوْبُنَا غُلْفٌ ط بَلْ لَّعَنَهُمُ اللّٰهُ بِكُفْرِهِمْ فَقَلِيْلًا مَّا يُؤْمِنُوْنَ ﴿٨٨﴾

हे म्हणतात की आमची अंत:करणे आवरण केलेली[६] आहेत. तसे नव्हे पण त्यांच्या नाकारण्यामुळे अल्लाहतआलाने त्यांना शापित केले आहे. फारच थोडे लोक ईमान आणतात[७] ८८

(१) या महावाक्यांमध्ये पुन्हा हेच वचन चर्चेत आहे, जे बनी इस्राईलकडून घेण्यात आले होते. परंतु याचीही त्यांनी उपेक्षाच केली. या वचनात सुरवातीला फक्त एका अल्लाहचीच उपासना करण्याची ताकीद आहे. जे प्रत्येक पैगंबराचे सैधांतिक आणि पहिले आवाहन आहे. (जसे सू.अंबिया आ.२५ आणि इतर महावाक्यांवरून स्पष्ट होते.) यानंतर आई बापांबरोबर चांगल्या वागणुकीची आज्ञा आहे. अल्लाहच्या उपासनेनंतर दुसऱ्या क्रमांकावर आई बापांचे आज्ञापालन, आणि त्यांच्याशी चांगल्या वागणुकीची ताकीद दिली गेली आहे. यावरून हे स्पष्ट झाले की, ज्याप्रमाणे अल्लाहची उपासना जरूरी आहे, त्याचप्रमाणे त्यांच्यानंतर आई बापांचे आज्ञापालन पण फार जरूरी आहे. आणि याच्यात हलगर्जीपणा करून चालणार नाही. कुरआनात वेगवेगळ्या जागी अल्लाहतआलाने आपल्या उपासनेनंतर दुसऱ्या क्रमांकावर आई वडिलांच्या आज्ञापालनाची चर्चा करून याचे महत्त्व स्पष्ट केले आहे. याच्यानंतर नातेवाईक, अनाथ आणि गरीब लोक यांचेबरोबर चांगल्या वागणुकीची ताकीद आणि चांगले बोलण्याचा हुकूम आहे. इस्लाममध्ये सुद्धा, या गोष्टीची मोठी ताकीद आहे. ज्याप्रमाणे अहादीसे रसूल ﷺ नी स्पष्ट होते. त्या काळात नमाजीला कायम करण्याचा आणि जकात अदा करण्याचा पण हुकूम आहे. यावरून माहित झाले की, या दोन्ही उपासना, मागच्या शरिअत (धर्मशास्त्र) मध्ये पण अस्तित्वात राहिल्या आहेत. यावरून त्यांचे महत्त्व स्पष्ट होते. इस्लाममध्ये सुद्धा या दोन्ही उपासना नि:संशय ठळक आहेत. येथपावेतो की यापैकी कुठल्या एकालाही नाकारणे किंवा त्याला टाळणे, कुफ्र सारखे समजण्यात आले आहे. जसे की, ह. अबु बकर सिद्दीक رضي الله عنه च्या खिलाफतच्या काळात

जकात देणे नाकारणाऱ्या लोकांचे विरुद्ध जिहाद करण्याने स्पष्ट होते.

(२)हुजूर ﷺ च्या काळात, अंसार (जे इस्लामपूर्वी बहुदेववादी होते) ची दोन घराणे होती. 'औस' आणि 'खजरज' यांच्यात नेहमी आपसात युद्ध चालत असे. त्याचप्रमाणे मदिनेच्या यहूद्यांची तीन घराणी होती. 'बनु कैनुकाअ', 'बनु नजीर' आणि 'बनु कुरैज़ा' हे सुद्धा आपसात लढत असत. 'बनु कुरैज़ा', 'औस' चे साथीदार आणि 'बनु कैनुकाअ' व 'बनु नजीर' 'खज़रज' चे साथीदार होते. युद्धाच्या वेळी हे आपल्या जोडीदाराची मदत करीत असत आणि आपल्याच धर्माच्या यहूद्यांना ठार मारत असत. त्यांची घरे लुटत आणि त्यांना हद्दपार करून टाकत. वास्तविक पाहता, तौरात अन्वये त्यांना असे करणे निषिद्ध (हराम) होते. परंतु ज्यावेळी यहूदी पराजित होऊन कैदी बनून जात; तेव्हा फिद्या (प्राणमूल्य) देऊन त्यांची सुटका करीत. आणि म्हणत की, आम्हाला तौरात मध्ये हाच हुकूम दिला गेला आहे. या महावाक्यामध्ये यहूद्यांच्या याच वर्तनाचे वर्णन करण्यात आले आहे की, त्यांनी धर्मशास्त्राला मेणासारखे करून टाकले होते. कुठल्या हुकूमावर अंमलबजावणी करीत असत आणि कधी कधी धर्मशास्त्राच्या हुकूमाला महत्त्वच देत नसत. वध करणे, हद्दपार करणे आणि आपल्याच लोकांविरूद्ध एक दुसऱ्याच्या विरोधात मदत करणे, हे त्यांच्या धर्म शास्त्रात पण निषिद्ध होते. या हुकूमांचा त्यांनी कुठलेही भय न बाळगता, आज्ञाभंग केला. आणि प्राणमूल्य (फिद्या) देऊन सोडवण्याचा जो हुकूम होता; त्यावर अंमलबजावणी केली. वास्तविक पहिल्या तीन हुकूमाचा ते आदर करते; तर प्राणमूल्य देऊन सोडवण्याची पाळीच आली नसती.

(३) येथे धर्मशास्त्राचा कोण्या आदेशाला मान्य करणे; आणि कोण्या आदेशाला, दृष्टीआड करण्याच्या शिक्षेचे वर्णन करण्यात येत आहे. याची शिक्षा या जगात मान,सन्मान आणि प्रतिष्ठेच्या ऐवजी. फजिती आणि अप्रतिष्ठा आणि परलोकात नित्य राहणाऱ्या देणग्याऐवजी सक्त शिक्षा आहे. यावरून माहित झाले की, अल्लाहतआलाजवळ ते आज्ञापालन कबूल केले जाते जे संपूर्ण असेल. काही काही गोष्टी मान्य करणे, व त्यावर अंमलबजावणी याचे अल्लाहतआलाजवळ काही महत्त्व नाही. हे महावाक्य आम्हा मुस्लिमांना सुद्धा विचार विमर्ष करण्याचे आवाहन करीत आहे की, मुस्लिमांच्या फजिती आणि अप्रतिष्ठेचे कारण मुस्लिमांची वागणूक ही तशीच वागणूक तर नाही? ज्याचे वर्णन सदरील महावाक्यात यहूद्यांच्या बाबतीत केले आहे.

(४) ''व कफ्फैना मिन बादिही, बिर्ररूसूल'' चा अर्थ आहे की, ह.मूसा عليه السلام च्या नंतर सातत्याने पैगंबर येत राहिले, येथ पावेतो की, बनी इस्राईल मध्ये पैगंबर येण्याचे सातत्य ह.ईसा. عليه السلام वर बंद झाले ''बैय्यनात'' ने चमत्कार अभिप्रेत आहे. जे ह. ईसा عليه السلام ला देण्यात आले होते. जसे मृतांना जिवंत करणे, कोडी आणि अंधांना दुरूस्त करणे वगैरे, ज्यांचे वर्णन सू.आले इमरान - ४९ मध्ये आहे. रुहूल कुदुस ने (पवित्र आत्माने) अभिप्रेत ह.जिब्राईल عليه السلام आहेत. यांना रूहुल कदुस यासाठी म्हटले आहे की, ते अल्लाहच्या निर्मितीच्या आदेशानुसार (अमरे तकविनी) अस्तित्वात आले होते. जसे ह.ईसा عليه السلام ला रूह म्हटले गेले आहे. आणि अलकुदुसने अल्लाहची व्यक्ती अभिप्रेत आहे आणि (अल्लाहशी जोडून मान सम्मान देणे) इब्ने जरीरने याला बरोबर म्हटले आहे की, सू.माइदः आ.१० मध्ये, रूहुल कुदुस आणि इंजील दोघांचे वेगवेगळे वर्णन आहे. याकरीता (रूहुल कदुसने इंजील, अभिप्रेत होऊ शकत नाही) आणखी एका महावाक्यात ह.जिब्राईल عليه السلام ला 'रूहुल अमीन' म्हटले आहे. आणि हुजूर ﷺ नी ह.हस्सान رضي الله عنه च्या बाबतीत म्हटले, हे अल्लाह ! रूहूल कुदुसकडून याचे समर्थन कर. एका दुसऱ्या हदीसमध्ये आहे, जिब्राईल عليه السلام तुमच्याबरोबर आहे. माहित झाले की, रूहुल कुदुस ने अभिप्रेत ह.जिब्राईल عليه السلام च आहेत. (फतहुल बयान, इब्ने कसीर, अस्त्रफुल हवाशीच्या हवाल्याने)

(५) जसे ह.मोहम्मद ﷺ ला आणि ह.ईसा عليه السلام ला नाकारले आणि ह.जकरीया عليه السلام व ह. यहया عليه السلام चा वध केला.

(६) म्हणजे हे मोहम्मद ﷺ ''आमच्यावर तुमच्या गोष्टींनी काहीही परिणाम होत नाही. आमची अंत:करणे पडद्यात आहेत. त्या गोष्टीपासून ज्यांच्याकडे तू आम्हास बोलावित आहेस'' (हा मीम सजदा-५)

(७) मनावर सत्य गोष्टीचा परिणाम न होणे, काही अभिमानाची गोष्ट नाही, परंतु हे तर धुत्कारल्या गेल्याचे लक्षण आहे. यांच्यात ईमान पण अत्यल्प आहे. (जे अल्लाहतआला जवळ स्वीकारार्ह नाही) किंवा यांच्यात ईमान आणणारे थोडेच लोक असतील.

وَلَمَّا جَآءَهُمْ كِتٰبٌ مِّنْ عِنْدِ اللّٰهِ مُصَدِّقٌ لِّمَا
مَعَهُمْ ۙ وَكَانُوْا مِنْ قَبْلُ يَسْتَفْتِحُوْنَ عَلَى الَّذِيْنَ كَفَرُوْا ۚ
فَلَمَّا جَآءَهُمْ مَّا عَرَفُوْا كَفَرُوْا بِهٖ ۡ فَلَعْنَةُ اللّٰهِ عَلَى
الْكٰفِرِيْنَ ﴿٨٩﴾

**आणि जेव्हा त्यांच्याजवळ अल्लाहतआलाचे पुस्तक त्यांच्या पुस्तकाचे सत्यत्व पटविणारे आले. हे स्वत: याच्यापूर्वी काफिरांविरूद्ध [१] विजय इच्छित होते. तर ते (पुस्तक) आल्यानंतर सुद्धा आणि त्या (पुस्तकाला) ओळखून घेतल्यावर सुद्धा त्याला नाकारू लागले, तर अल्लाहतआलाचा शाप असो (या) नाकारणाऱ्यांवर!(८९)**

بِئْسَمَا اشْتَرَوْا بِهٖٓ اَنْفُسَهُمْ اَنْ يَّكْفُرُوْا بِمَآ اَنْزَلَ اللّٰهُ
بَغْيًا اَنْ يُّنَزِّلَ اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖ عَلٰى مَنْ يَّشَآءُ مِنْ
عِبَادِهٖ ۚ فَبَآءُوْ بِغَضَبٍ عَلٰى غَضَبٍ ۭ وَلِلْكٰفِرِيْنَ عَذَابٌ
مُّهِيْنٌ ﴿٩٠﴾

**फार वाईट गोष्ट आहे. जिच्या बदल्याात त्यांनी आपल्या स्वत:ला विकून टाकले, ती (गोष्ट म्हणजे) यांचे नाकारणे होय. अल्लाहतआलाकडून अवतरीत झालेल्या त्या वस्तू (कुरआनाबाबत) त्यांच्या मनात द्वेष[२] आला की, अल्लाहतआलाने आपली कृपा ज्या सेवकावर इच्छिली त्यावर केली. याच्यामुळे ते कोपावर कोपात[३] येऊन सापडले आणि नाकारणाऱ्यांच्यासाठी फजिती होणारी शिक्षा आहे. (९०)**

وَاِذَا قِيْلَ لَهُمْ اٰمِنُوْا بِمَآ اَنْزَلَ اللّٰهُ قَالُوْا نُؤْمِنُ بِمَآ
اُنْزِلَ عَلَيْنَا وَيَكْفُرُوْنَ بِمَا وَرَآءَهٗ ۤ وَهُوَ الْحَقُّ
مُصَدِّقًا لِّمَا مَعَهُمْ ۭ قُلْ فَلِمَ تَقْتُلُوْنَ اَنْۢبِيَآءَ اللّٰهِ
مِنْ قَبْلُ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿٩١﴾

**आणि जेव्हा त्यांना सांगण्यात येते की अल्लाहतआलाने उतारलेल्या पुस्तकावर ईमान आणा तर सांगून टाकतात की, जे आमच्यावर उतारण्यात आले आहे त्यांचेवर आमचे ईमान[४] आहे. वास्तविक त्याच्यानंतर (आलेले पुस्तक) जे त्यांच्या पुस्तकाला मान्यता देते, (त्याला) नाकारतात. बरे त्यांना हे तर विचारा की जर हे तुमचे ईमान पहिल्या पुस्तकावर आहे, तर तुम्ही पूर्वीच्या पैगंबरांना का ठार केले होते[५]?(९१)**

وَلَقَدْ جَآءَكُمْ مُّوْسٰى بِالْبَيِّنٰتِ ثُمَّ اتَّخَذْتُمُ الْعِجْلَ
مِنْۢ بَعْدِهٖ وَاَنْتُمْ ظٰلِمُوْنَ ﴿٩٢﴾

**तुमच्याजवळ तर ह.मूसा (अ.) हेच पुरावे घेऊन आले होते. परंतु तरी सुद्धा तुम्ही वासरांची पूजा[६] केली. तुम्ही आहातच कृतघ्न (९२)**

(१) ''यसतफ्तिहुन'' चा एक अर्थ असा की, वर्चस्व व सहाय्यतासाठी प्रार्थना करीत होते. म्हणजे जेव्हा यहूदी, बहुदेववाद्यांकडून हार खात असत, तेव्हा प्रार्थना करीत, की हे अल्लाह! शेवटच्या पैगंबराला लवकर प्रकट कर की आम्ही त्याला मिळून या बहुदेववाद्यांवर वर्चस्व प्रस्थापित करू. दुसरा अर्थ बातमी देण्याचा आहे की लवकरच नबीचे प्रकटीकरण होईल. (फत्हुल कदीर) परंतु प्रकटीकरणानंतर याची जाणीव असताना सुद्धा मोहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर केवळ द्वेषापोटी ईमान आणले नाही, जसे पुढील महावाक्यात आहे.

(२) म्हणजे या गोष्टीची जाणीव असताना सुध्दा की, मोहम्मद ﷺ हेच ते शेवटचे पैगंबर आहेत. ज्यांची गुणवैशिष्टये तौरात व इंजील मध्ये नमूद आहेत; आणि त्यावरूनच ग्रंथधारी लोक त्यांना एक मुक्तीदाता म्हणून त्यांची वाट पाहत होते, परंतु त्यांच्यावर केवळ या ईर्ष्या आणि द्वेषापोटी ईमान आणले नाही, की हा पैगंबर आमच्या वंशातून काआला नाही ? जशी आमची अपेक्षा होती. म्हणजे त्यांचे नाकारणे पुराव्यावर आधारित नव्हते तर वांशिक तिरस्कारावर व द्वेष आणि हटधर्मींवर आधारित होते.

(३) कोपावर कोपाचा अर्थ म्हणजे खुपच जास्त कोप. कारण की ते वारंवार कोप (म्हणजे राग) आणणारी कामे करीत होते. असे मागे स्पष्टीकरण आले आहे आणि केवळ द्वेषापोटी कुरआन आणि ह.मोहम्मद ﷺ ला नाकारले.

(४) म्हणजे आम्ही तौरातवर ईमान ठेवतो; म्हणजे याच्यानंतर आम्हाला कुरआनावर ईमान आणण्याची जरूरी नाही.

(५) म्हणजे तुमच्या तौरातवर ईमान आणण्याचा दावापण बरोबर नाही. जर तुमचे तौरातवर ईमान असते तर तुम्ही पैगंबरांना ठार केले नसते. त्यामुळे ठाऊक झाले की, तुमचे नाकारणे केवळ द्वेष आणि वांशिक तिरस्कारावर आधारित आहे.

(६) हा त्यांच्या जाणून बुझून नाकारण्याचा आणि वांशिक तिरस्काराचा आणखी एक पुरावा हा आहे की, ह.मूसा (अ.) स्पष्ट निशाण्या आणि (यांच्या म्हणण्याचे) खंडन करणारे पुरावे यासाठी घेऊन आले की, ते अल्लाहचे रसूल (पैगंबर) आहेत.आणि हे की अल्लाहतआलाच फक्त उपास्य आहे. परंतु तुम्ही याच्यानंतर सुद्धा ह. मूसा عليه السلام ला पण त्रास दिला आणि एका उपास्याला सोडून वासराला आपला उपास्य बनविले.

وَإِذْ أَخَذْنَا مِيثَاقَكُمْ وَرَفَعْنَا فَوْقَكُمُ الطُّورَ خُذُوا مَا آتَيْنَاكُم بِقُوَّةٍ وَاسْمَعُوا ۖ قَالُوا سَمِعْنَا وَعَصَيْنَا وَأُشْرِبُوا فِي قُلُوبِهِمُ الْعِجْلَ بِكُفْرِهِمْ ۚ قُلْ بِئْسَمَا يَأْمُرُكُم بِهِ إِيمَانُكُمْ إِن كُنتُم مُّؤْمِنِينَ ﴿٩٣﴾

**आणि जेव्हा आम्ही तुमच्याकडून वचन घेतले आणि तुमच्यावर तूर पर्वताला उभे केले, (आणि सांगून टाकले की) आम्ही दिलेल्या वस्तूला घट्ट धरून ठेवा आणि ऐका, तर त्यांनी म्हटले आम्ही ऐकले आणि आज्ञाभंग केला(१). आणि त्यांच्या कुफ्रमुळे(२) त्यांच्या मनात वासराचे प्रेम (जणू) पक्के झाले(३). त्यांना सांगा की, तुमचे ईमान तुम्हाला वाईट हुकूम देत आहे, जर तुम्ही ईमानवाले आहात ९३**

قُلْ إِن كَانَتْ لَكُمُ الدَّارُ الْآخِرَةُ عِندَ اللَّهِ خَالِصَةً مِّن دُونِ النَّاسِ فَتَمَنَّوُا الْمَوْتَ إِن كُنتُمْ صَادِقِينَ ﴿٩٤﴾

**आपण सांगून टाका की, जर परलोकाचे घर अल्लाहजवळ फक्त तुमच्यासाठीच आहे आणि इतर कोणासाठी नाही. तर आपल्या सत्यतेच्या पृष्ठर्थ्य मृत्यूची हाव धाला ९४**

وَلَن يَتَمَنَّوْهُ أَبَدًا بِمَا قَدَّمَتْ أَيْدِيهِمْ ۗ وَاللَّهُ عَلِيمٌ بِالظَّالِمِينَ ﴿٩٥﴾

**परंतु आपल्या कर्तृत्वाला पहातांना ते कधीही मृत्यूची आकांक्षा बाळगणार नाही(४). अल्लाहतआला या जालीमांना खूप चांगल्या प्रकारे ओळखतो ९५**

وَلَتَجِدَنَّهُمْ أَحْرَصَ النَّاسِ عَلَىٰ حَيَاةٍ وَمِنَ الَّذِينَ أَشْرَكُوا ۚ يَوَدُّ أَحَدُهُمْ لَوْ يُعَمَّرُ أَلْفَ سَنَةٍ وَمَا هُوَ بِمُزَحْزِحِهِ مِنَ الْعَذَابِ أَن يُعَمَّرَ ۗ وَاللَّهُ بَصِيرٌ بِمَا يَعْمَلُونَ ﴿٩٦﴾

**किंबहुना सर्वात जास्त ऐहिक जीवनाचा लोभी, आपण त्यांनाच पावाल. हा जीवनाचा लोभ बहुदेववाद्यांपेक्षा सुद्धा जास्त(५) आहे. यांच्यातून तर प्रत्येक माणूस एक हजार वर्षांचे आयुष्य इच्छितो. तरी हे आयुष्य दिले जाणे त्यांना शिक्षेपासून सोडवू शकत नाही. अल्लाहतआला त्यांच्या कृत्यांना चांगल्याप्रकारे पाहत आहे ९६**

(१) ही नाकारण्याची आणि वांशिक विद्धेषाची परिसीमा आहे, की जिभेने तर मान्य केले की, आम्ही ऐकून घेतले म्हणजे आज्ञापालन करू आणि मनात ही नियत की, आम्हास कोणते कर्म करावयाचे आहे?

(२) एकतर प्रेम एक अशी वस्तू आहे की माणसाला आंधळा आणि बहिरा बनवून टाकते (मुसनद अहमद, इब्ने कसीरच्या हवाल्याने) दुसरे याला ''उशरेबु'' (पाजण्यात आले आहे.) ने तुलना करण्यात आली. कारण पाणी मनुष्याच्या रगरगमध्ये खूप धावते, या उलट अन्न असे धावत नाही. (फतहुल कदीर)

(३) म्हणजे पाप कर्माने आणि वासराचे प्रेम व उपासनेचे कारण ते कुफ्र होते, ज्याने यांच्या अंत:करणात घर केले होते.

(४) ह.इब्ने अब्बास ﷺ नी याचे भाष्य एका दुसऱ्यासाठी बद्दुआ करण्याचे आवाहन असे केले आहे. म्हणजे यहुद्यांना सांगण्यात आले की जर तुम्ही ह. मोहम्मद ﷺ च्या पैगंबरीला नाकारण्याला, आणि अल्लाहचे लाडके असण्याच्या दाव्यात खरे असाल, तर 'मुबाहिला' करून घ्या. म्हणजे अल्लाहच्या दरबारी मुस्लिम आणि यहूदी दोन्ही मिळून प्रार्थना करू की, आमच्यातून जो पक्ष खोटारडा आहे, त्याला मृत्यू दे ! हेच आवाहन त्यांना सू. जुमआ मध्ये सुद्धा दिले गेले आहे. नजरानच्या ख्रिस्त्यांनापण असे ''मुबाहिलाचे'' आवाहन करण्यात आले होते. जसे सू. आले इमरान मध्ये आहे. परंतु यहूदीपण ख्रिस्त्यांसारखे खोटारडे होते. यासाठी ख्रिस्त्यांसारखे यहूद्यांविषयी अल्लाहतआलाने म्हटले हे कधीही मृत्यूची आकांक्षा (म्हणजे मुबाहिला) करणार नाहीत. हाफीज इब्ने कसीरने या भाष्याला, समर्थन दिले आहे.(तफसीर इब्ने कसीर)

(५) मृत्यूची आकांक्षा तर काय? हे तर ऐहिक जीवनाचे सर्व लोकांपेक्षा किंबहुना, बहुदेववाद्यांपेक्षा सुद्धा जास्त लोभी होते. परंतु वयोमानातील ही वाढ त्यांना अल्लाहच्या प्रकोपापासून वाचवू शकत नाही. या महावाक्यावरून हे ठाऊक झाले की, यहूदी आपल्या या दाव्यात एकदम खोटारडे होते की, ते अल्लाहचे प्रिय आणि लाडके आहेत. किंवा स्वर्गाचे हकदार फक्त तेच आहे, आणि दुसरे नरकवासी. कारण की प्रत्यक्षात जर असे असते, तर कमीत कमी त्यांना आपल्या दाव्याच्या सत्यतेवर संपूर्ण भरोसा असता, तर खचितच ते मुबाहिला करण्यावर तयार झाले असते, की त्यांची सत्यता स्पष्ट झाली असती आणि मुस्लिमांची चूक जाहीर झाली असती. मुबाहिल्यापूर्वी यहूद्यांचे विन्मुख होणे, आणि सत्यापासून पळ काढणे, या गोष्टीचे निदर्शक आहे की, जरी आपल्या जिव्हेने मनाला लुभविणाऱ्या गोष्टी करत असले तरी त्यांची अंत:करणे खऱ्या वास्तविकतेला जाणत होती. आणि त्यांना ठाऊक होते की, अल्लाहच्या दरबारी हजर झाल्यानंतर त्यांचा परिणाम तोच होईल, जो अल्लाहने आपला आज्ञाभंग करणाऱ्या लोकांसाठी निश्चित करून ठेवला आहे.

قُلْ مَنْ كَانَ عَدُوًّا لِّجِبْرِيْلَ فَاِنَّهٗ نَزَّلَهٗ عَلٰى قَلْبِكَ
بِاِذْنِ اللّٰهِ مُصَدِّقًا لِّمَا بَيْنَ يَدَيْهِ وَهُدًى وَّبُشْرٰى
لِلْمُؤْمِنِيْنَ ﴿٩٧﴾

**(हे पैगंबरा!) आपण सांगून टाका, जो जिब्रईल (अ.) चा शत्रू असेल, ज्याने आपल्या हृदयावर अल्लाहचा संदेश अवतरीत केला आहे, त्यांच्याजवळ असलेल्या पुस्तकाला मान्यता देणारा, आणि ईमानवाल्यांना मार्गदर्शन करणारा, आणि खुषखबर देणारा[१] आहे.(९७)**

مَنْ كَانَ عَدُوًّا لِّلّٰهِ وَمَلٰٓئِكَتِهٖ وَرُسُلِهٖ وَجِبْرِيْلَ
وَمِيْكٰلَ فَاِنَّ اللّٰهَ عَدُوٌّ لِّلْكٰفِرِيْنَ ﴿٩٨﴾

**जी व्यक्ती अल्लाहचा, आणि त्याच्या देवदूतांचा आणि त्याच्या पैगंबराचा, आणि जिब्रईल (अ.) व मिकाईल (अ.) चा दुष्मन असेल, अशा काफिरांचा दुष्मन स्वत: अल्लाहतआला आहे[२]. (९८)**

وَلَقَدْ اَنْزَلْنَآ اِلَيْكَ اٰيٰتٍۭ بَيِّنٰتٍ ۚ وَمَا يَكْفُرُ بِهَآ
اِلَّا الْفٰسِقُوْنَ ﴿٩٩﴾

**आणि खचितच आपल्याकडे, आम्ही सुबोध आणि स्पष्ट अर्थाची प्रमाणे (महावाक्ये किंवा कुरआन) उतरविली आहेत. त्यांना वाईट कृत्ये करणाराशिवाय, कोणीही नाकारत नाही.(९९)**

اَوَكُلَّمَا عٰهَدُوْا عَهْدًا نَّبَذَهٗ فَرِيْقٌ مِّنْهُمْ ۭ بَلْ
اَكْثَرُهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿١٠٠﴾

**हे लोक, जेव्हा कधी कुणी वचन देतात; तर त्यांचा एक ना एक गट, त्याला तोडून टाकतो; परंतु बहुतेक त्यांच्यातून ईमान नसलेले आहेत.(१००)**

وَلَمَّا جَاۗءَهُمْ رَسُوْلٌ مِّنْ عِنْدِ اللّٰهِ مُصَدِّقٌ لِّمَا
مَعَهُمْ نَبَذَ فَرِيْقٌ مِّنَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ ۙ كِتٰبَ
اللّٰهِ وَرَاۗءَ ظُهُوْرِهِمْ كَاَنَّهُمْ لَا يَعْلَمُوْنَ ﴿١٠١﴾

**जेव्हा कधी, त्यांचेपाशी अल्लाहचा कोणी पैगंबर, त्यांच्या पुस्तकाचे सत्य ठरवणारा आला, या ग्रंथधारी लोकांच्या एका गटाने, अल्लाहच्या पुस्तकाला अशा प्रकारे पाठीमागे टाकले, जणू काही त्यांना ठाऊकच[३] नव्हते (१०१)**

१) हदीसमध्ये आले आहे की, काही यहूदी धर्मपंडीत, नबी ﷺ जवळ आलेत, आणि म्हणाले, ''जर आपण आमच्या प्रश्नांचे बरोबर उत्तर दिले तर आम्ही ईमान आणूं'', कारण पैगंबराशिवाय, कोणी यांना उत्तर देऊ शकत नव्हते, जेव्हा हुजूर ﷺ नी यांच्या प्रश्नाचे बरोबर उत्तर देऊन टाकले; तर त्यांनी विचारले, आपणांवर वह्य कोण आणतो? हुजूर ﷺ नी सांगितले की, ह.जिब्रईल عليه السلام . यहूदी म्हणू लागले की, जिब्रईल عليه السلام तर आमचा शत्रू आहे. तोच तर युध्द आणि प्रकोपाला घेऊन अवतरीत होत असतो. आणि या बहाण्याने आपली पैगंबरी मानण्यास नकार दिला. (इब्ने कसीर आणि फत्हुल कदीर)

२) यहूदी म्हणत असत की, ह.मिकाईल عليه السلام आमचे मित्र आहेत; अल्लाहने म्हटले हे सर्व माझे मान्यता प्राप्त सेवक आहेत. जो कोणी यांच्यापैकी कोणा एकाचा शत्रू असेल, तो अल्लाहचापण शत्रू आहे. हदीसमध्ये आहे, ''ज्याने कोणी माझ्या कोण्या मित्राशी शत्रुत्व बाळगले; त्याने माझ्याबरोबर युद्धाची घोषणा केली आहे.'' (सही बुखारी) जणूंअल्लाहच्या एका मित्राबरोबर पण शत्रुत्व अल्लाहच्या सर्व मित्रांशी किंबहुना अल्लाहतआला बरोबर पण शत्रुत्व आहे. यावरून हे स्पष्ट झाले की, अल्लाहच्या मित्रांशी प्रेम आणि त्यांचा सन्मान करणे अत्यंत जरूरी आहे. आणि त्यांचा द्वेष करणे आणि शत्रुत्व करणे इतका मोठा अपराध आहे की, अल्लाहतआला त्याचे विरुद्ध युद्धाची घोषणा करतो. अल्लाहचे मित्र कोण आहेत? यासाठी कृपया पहा सू.यूनुस महावाक्य ६२-६३. परंतु प्रेम आणि सन्मानाचा हा अर्थ अजिबात नाही की, त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कबरीवर घुमट बनविले जावेत; त्यांच्या कबरीवर दरवर्षी उर्साच्या नावाखाली मेळाव्यांचे आयोजन केले जावे; त्यांच्या नावाने नवस, कबरींना न्हाऊ घालणे, आणि त्यांच्यावर चादरी चढविणे आणि त्यांना इच्छापूर्ती करणारा व विघ्नहर्ता नफा नुकसानीचा मालक समजले जावे. त्यांच्या कबरीवर वारंवार जाऊन उभे रहाणे, त्यांच्या दरवाज्यांवर हाजरी देणे आणि त्यांच्या चौकटीवर सजदा करणे वगैरे. जसे दुर्दैवाने ''अल्लाहच्या मित्रांशी प्रेम'' या नांवाने ही कारोबारे लात व मनात म्हणजे कबरपुजा, ऊर्जावस्थेत आहे. वास्तविक पाहतां हे प्रेम नसून त्यांची उपासना आहे, जी शिर्क आणि मोठा अपराध आहे. अल्लाहतआला या कबरपरस्तीच्या फितन्यापासून आम्हाला सुरक्षित ठेवो ! आमीन

३) अल्लाहतआला नबी ﷺ ला उद्देशून सांगत आहे, ''आम्ही तुम्हास पुष्कळ स्पष्ट प्रमाणे दिलेली आहेत, ज्यांना पाहून यहूद्यांनी पण ईमान आणले पाहिजे होते ; याशिवाय त्यांचे पुस्तक तौरातमध्ये सुद्धा आपल्यागुण वैशिष्ट्यांचे वर्णन आणि आपल्यावर ईमान आणण्याचे वचन मौजूद (उपस्थित) आहे. परंतु त्यांनी पूर्वी ही कधी कुठल्या वचनाची पर्वा केली आहे; जी या वचनाची पर्वा ते करतील ? वचनभंग करणे, यांच्या एका गटाची नेहमीची सवय आहे. येथपावेतो की, त्यांनी अल्लाहच्या पुस्तकाला अशाप्रकारे पाठीमागे, टाकले की जणू त्यांना ते ठाऊकच नाही.

وَ اتَّبَعُوْا مَا تَتْلُوا الشَّيٰطِيْنُ عَلٰى مُلْكِ سُلَيْمٰنَ ۚ
وَ مَا كَفَرَ سُلَيْمٰنُ وَلٰكِنَّ الشَّيٰطِيْنَ كَفَرُوْا يُعَلِّمُوْنَ
النَّاسَ السِّحْرَ ۗ وَمَآ اُنْزِلَ عَلَى الْمَلَكَيْنِ بِبَابِلَ
هَارُوْتَ وَ مَارُوْتَ ۭ وَمَا يُعَلِّمٰنِ مِنْ اَحَدٍ حَتّٰى
يَقُوْلَآ اِنَّمَا نَحْنُ فِتْنَةٌ فَلَا تَكْفُرْ ۭ فَيَتَعَلَّمُوْنَ مِنْهُمَا
مَا يُفَرِّقُوْنَ بِهٖ بَيْنَ الْمَرْءِ وَزَوْجِهٖ ۭ وَمَا هُمْ
بِضَاۗرِّيْنَ بِهٖ مِنْ اَحَدٍ اِلَّا بِاِذْنِ اللّٰهِ ۭ وَيَتَعَلَّمُوْنَ
مَا يَضُرُّهُمْ وَلَا يَنْفَعُهُمْ ۭ وَلَقَدْ عَلِمُوْا لَمَنِ اشْتَرٰىهُ
مَا لَهٗ فِي الْاٰخِرَةِ مِنْ خَلَاقٍ ڟ وَلَبِئْسَ مَا شَرَوْا
بِهٖٓ اَنْفُسَهُمْ ۭ لَوْ كَانُوْا يَعْلَمُوْنَ ١٠٢

**आणि त्या वस्तुच्या मागे लागले, ज्याला शैतान, ह.सुलैमान (अ.) च्या राज्यात पठन करत होते; ह.सुलेमान (अ.) ने तर कुफ्र केले नव्हते. परंतु हे कुफ्र शैतानांचे होते, ते लोकांना जादू शिकवत असत[१]. आणि बाबेलमध्ये हारूत आणि मारूत या दोन देवदूतांवर जे अवतरीत करण्यांत आले[२] होते (ते) दोघेपण कुठल्याही माणसाला, त्या वेळेपर्यंत शिकवत नसत[३]; जोपर्यंत हे न सांगून देत की, आम्ही तर फक्त एक परीक्षा आहोत; तू कुफ्र[४] करू नकोस. मग त्याच्याकडून हे शिकत की, पती-पत्नीमध्ये फुट टाकून देत आणि खरे पहाता, अल्लाहतआलाच्या मर्जीशिवाय कोणाचे काही नुकसान करू शकत[५] नव्हते. हे लोक ते शिकतात जे यांना न नुकसान पोहोचवेल आणि न त्यांना नफा पोहचवू शकणार. आणि ते खात्रिपूर्वक जाणतात, या (विद्ये) मुळे परलोकांत त्यांचा काहीही वाटा नाही. आणि ती अत्यंत वाईट गोष्ट आहे; ज्याच्याऐवजी ते आपल्या स्वत:ला विकून टाकतात. जर ते हे जाणत असते! (१०२)**

१) म्हणजे या यहूद्यांनी अल्लाहचे पुस्तक आणि त्यांनी दिलेल्या वचनाची काही पर्वा केली नाही. परंतु शैतानांच्या मागे लागून फक्त जादू टोणे करत राहिले (असे नाही तर) दावा केला की, ह.सुलैमान عليه السلام पण (नाऊजो बिल्लाह्) अल्लाहचे पैगंबर नव्हते पण एक जादूगार होते. आणि जादूच्या जोरावर राज्य करीत राहिले. अल्लाहतआलाने म्हटले ह.सुलैमान عليه السلام जादूटोणा करीत नव्हते; कारण जादूटोणा तर कुफ्र आहे. अशा जादूचे पाप ह.सुलैमान عليه السلام कसे करू शकतील? असे म्हणतात की हजरत सुलैमान عليه السلام च्या काळी जादूचे प्रमाण फारच प्रचलित झाले होते. ह.सुलैमान عليه السلام नी याला रोकण्यासाठी जादूची पुस्तके गोळा करून, आपल्या सिंहासनाखाली पुरून टाकली. ह.सुलैमान عليه السلام च्या मृत्यूनंतर शैतान आणि जादूगिरांनी या पुस्तकांना काढून फक्त लोकांना दाखविली नाही, तर लोकांना असे सांगितले की, ह.सुलैमान عليه السلام च्या सामर्थ्याचे आणि मोठेपणाचे रहस्य हेच जादू करणे होते. याच आधारावर या जालीम लोकांनी ह.सुलैमान عليه السلام ला पण काफिर घोषित केले; ज्याचे अल्लाहतआलाने खंडन केले. (इब्ने कसीर वगैरे)

२) अल्लाहतआलाने कुठल्याही स्पष्टीकरणाशिवाय अगदी संक्षिप्तपणे ही घटना वर्णन केलेली आहे. आम्हाला फक्त याच्यावर याच मर्यादेपर्यंत ईमान ठेवले पाहिजे. (तफसीर इब्ने कसीर)

कुरआनाच्या शब्दांवरून हे जरूर माहित पडते की, अल्लाहतआलाने बाबेलमध्ये हारूत व मारूत देवदूतांवर जादूचे ज्ञान अवतरीत केले होते आणि याचा उद्देश्य असा ठाऊक पडतो की, त्यांनी लोकांना सांगून टाकावे की, पैगंबर عليه السلام लोकांकडून जाहीर होणारे चमत्कार जादू पेक्षा वेगळी गोष्ट आहे. आणि जादू ही आहे; ज्याचे ज्ञान अल्लाहतआलाकडून आम्हास देण्यात आले आहे. (सध्या जादू सर्वत्र झाल्याने लोक पैगंबरांना सुद्धा नाऊजो बिल्लाह, जादूगीर आणि चालाकी दाखविणारे समजू लागले होते.) याच घोटाळ्यापासून लोकांना वाचविण्यासाठी आणि एक प्रकारे परीक्षा घेण्यासाठी देवदूतांना उतारण्यात आले.

दुसरा उद्देश बनुइस्राईलच्या चारित्र्य हननाकडे अंगुली निर्देश करण्याचा वाटतो की, बनुइस्राईल जादू शिकण्यासाठी या देवदूतांमागे कसे लागले आणि हे दाखवून दिल्यानंतर सुद्धा की जादू कुफ्र आहे, आणि आम्ही परीक्षा घेण्यासाठी आलेलो आहोत ते जादूची विद्या शिकण्यासाठी उतावळेपणा करीत होते. ज्यामुळे त्यांचा उद्देश्य नांदत्या घरांना उजाड करून टाकणे आणि पती पत्नीमध्ये तिरस्कार निर्माण करणे हा होता. म्हणजे हे त्यांच्या पतन, बिघाड आणि फसादच्या शृंखलेची एक महत्त्वाची कडी होती. आणि अशाप्रकारे आळ घेणे आणि चारित्र्य हनन एखाद्या समाजांत फारच बिघाडाचे लक्षण आहे. (अल्लाहतआला त्यांच्यासारखे होण्यापासून वाचवो !आमीन.)

३) हे असेच आहे की, जसे असत्याला रद्द करण्यासाठी असत्य धर्मांचे ज्ञान कोण्या धर्मपंडीताकडून प्राप्त करणे गुरु शिष्याला या भरोशावर ज्ञान देईल की, असत्य धर्माचे ज्ञान दिल्यावर तो याचे खंडन करीन. परंतु ज्ञान मिळविल्यानंतर तो स्वत:च धर्मभ्रष्ट होऊन जाईल, किंवा या ज्ञानाचा दुरुपयोग करील; तर गुरु दोषास पात्र होणार नाही.

४) आम्ही अल्लाहकडून सेवकांसाठी एक परीक्षा आहोत. (फत्हुल कदीर)

५) जादूपण त्या वेळेपर्यंत कुणाचे नुकसान करू शकत नाही, जोपर्यंत अल्लाहची मर्जी आणि त्याची आज्ञा होणार नाही. यामुळे याच्या शिकण्याचा फायदा तरी काय? याच कारणाने इस्लामने जादू शिकण्याला आणि त्यावर अंमलबजावणी करण्याला 'कुफ्र' ठरविले आहे. सर्व प्रकारच्या भलाईच्या प्राप्तीसाठी आणि आजाराला बरे करण्यासाठी फक्त अल्लाहतआलाकडेच विद्वीत केले जावे; कारण तोच प्रत्येक वस्तूचा निर्माता आहे; आणि या ब्रम्हांडात प्रत्येक काम त्याच्या मर्जीनुसार होत असते.

وَلَوْ أَنَّهُمْ آمَنُوا وَاتَّقَوْا لَمَثُوبَةٌ مِّنْ عِندِ اللَّهِ خَيْرٌ ۖ لَّوْ كَانُوا يَعْلَمُونَ ١٠٣

**जर हे लोक ईमानवाले परहेजगार बनले असते, तर अल्लाहतआलाकडून, त्यांना चांगला मोबदला मिळाला असता, जर ते जाणत असते (१०३)**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تَقُولُوا رَاعِنَا وَقُولُوا انظُرْنَا وَاسْمَعُوا ۗ وَلِلْكَافِرِينَ عَذَابٌ أَلِيمٌ ١٠٤

**हे ईमानवाल्यांनो! तुम्ही नबी (सल्ल.) ला 'राअिना' म्हणत जाऊ नका; परंतु ''उन्ज़ुरना''[१] म्हणत जा; म्हणजे आमच्याकडे पहा; आणि ऐकत रहा; आणि काफिरांसाठी, यातनादायक शिक्षा आहे. (१०४)**

مَّا يَوَدُّ الَّذِينَ كَفَرُوا مِنْ أَهْلِ الْكِتَابِ وَلَا الْمُشْرِكِينَ أَن يُنَزَّلَ عَلَيْكُم مِّنْ خَيْرٍ مِّن رَّبِّكُمْ ۗ وَاللَّهُ يَخْتَصُّ بِرَحْمَتِهِ مَن يَشَاءُ ۚ وَاللَّهُ ذُو الْفَضْلِ الْعَظِيمِ ١٠٥

**ग्रंथधारी लोकांतील काफिर आणि बहुदेववादी,तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर काही भलाई अवतरीत व्हावी; हे इच्छित नाहीत. अल्लाहतआला ज्याला इच्छितो , त्याला आपल्या खास दयेतून, (दया) देतो ; अल्लाहतआला मोठाच कृपानिधान आहे (१०५)**

مَا نَنسَخْ مِنْ آيَةٍ أَوْ نُنسِهَا نَأْتِ بِخَيْرٍ مِّنْهَا أَوْ مِثْلِهَا ۗ أَلَمْ تَعْلَمْ أَنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ١٠٦

**ज्या महावाक्यांना आम्ही रद्द करून टाकू, किंवा (तुम्हाला) त्यांचा विसर पाडून टाकू (तेव्हा) याच्यापेक्षा उत्कृष्ट किंवा याच्याच सारखे (महावाक्य) आणू; काय तुम्हास ठाऊक नाही का? की अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे.(१०६)**

أَلَمْ تَعْلَمْ أَنَّ اللَّهَ لَهُ مُلْكُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ ۗ وَمَا لَكُم مِّن دُونِ اللَّهِ مِن وَلِيٍّ وَلَا نَصِيرٍ ١٠٧

**काय तुला ठाऊक नाही की, पृथ्वी आणि आकाशाचे राज्य अल्लाहचेच आहे[२]? आणि अल्लाहशिवाय तुमचा कोणी मित्र (वली) व मददगार नाही. (१०७)**

أَمْ تُرِيدُونَ أَن تَسْأَلُوا رَسُولَكُمْ كَمَا سُئِلَ مُوسَىٰ مِن قَبْلُ ۗ وَمَن يَتَبَدَّلِ الْكُفْرَ بِالْإِيمَانِ فَقَدْ ضَلَّ سَوَاءَ السَّبِيلِ ١٠٨

**काय, तुम्ही आपल्या पैगंबरांना सुद्धा हेच विचारू इच्छिता, जे पूर्वी मूसा (अ.) ला विचारले गेले[३] होते? आणि (ऐका) ईमानला कुफ्रने बदलणारा सरळ मार्गाहून भटकून जातो. (१०८)**

وَدَّ كَثِيرٌ مِّنْ أَهْلِ الْكِتَابِ لَوْ يَرُدُّونَكُم مِّن بَعْدِ إِيمَانِكُمْ كُفَّارًا حَسَدًا مِّنْ عِندِ أَنفُسِهِم مِّن بَعْدِ مَا تَبَيَّنَ لَهُمُ الْحَقُّ ۖ فَاعْفُوا وَاصْفَحُوا حَتَّىٰ يَأْتِيَ اللَّهُ بِأَمْرِهِ ۗ إِنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ١٠٩

**या ग्रंथधारीपैकी बहुतेक लोक सत्य स्पष्ट (जाहीर) झाल्यावर सुद्धा, केवळ इर्ष्या आणि द्वेषामुळे, तुम्हास पण ईमानपासून हटवू इच्छिता; तुम्ही पण माफ करा आणि जाऊ द्या, येथपावेतो की, अल्लाहतआला आपला हुकूम सादर करीन, खचितच अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे. (१०९)**

وَأَقِيمُوا الصَّلَاةَ وَآتُوا الزَّكَاةَ ۚ وَمَا تُقَدِّمُوا لِأَنفُسِكُم مِّنْ خَيْرٍ تَجِدُوهُ عِندَ اللَّهِ ۗ إِنَّ اللَّهَ بِمَا تَعْمَلُونَ بَصِيرٌ ١١٠

**तुम्ही नमाजीला कायम करा आणि जकात अदा करीत रहा; आणि जी काही भलाई तुम्ही आपल्यासाठी पुढे पाठवाल (ती) अल्लाहतआलाजवळ (तुम्ही) पावाल. नि:संशय अल्लाहतआला तुमच्या कर्मांना खूप (चांगल्याप्रकारे) पहात[४] आहे. (११०)**

وَقَالُوا لَن يَدْخُلَ الْجَنَّةَ إِلَّا مَن كَانَ هُودًا أَوْ نَصَارَىٰ ۗ تِلْكَ أَمَانِيُّهُمْ ۗ قُلْ هَاتُوا بُرْهَانَكُمْ إِن كُنتُمْ صَادِقِينَ ١١١

**आणि हे म्हणतात की, स्वर्गांमध्ये यहूदी आणि खिस्त्यांशिवाय कोणी जाणार नाही. ही फक्त त्यांची कल्पना आहे. यांना सांगा की जर तुम्ही खरे आहांत तर एखादे प्रमाण[५] तरी पुढे करा (१११)**

بَلَىٰ مَنْ أَسْلَمَ وَجْهَهُ لِلَّهِ وَهُوَ مُحْسِنٌ فَلَهُ أَجْرُهُ عِندَ رَبِّهِ وَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُونَ ١١٢

**ऐका, जो कोणी खऱ्या निखलासपणाने अल्लाहतआला समोर विनम्र[६] झाला; नि:संशय त्याचा पालनकर्ता त्याला, पुरेपूर मोबदला देईल, आणि (परत्री) त्याला कुठलेच भय राहणार नाही आणि दु:ख निराशा राहणार नाही. (११२)**

१) 'राअिना' चा अर्थ आहे, आमच्याकडे लक्ष द्या, आमचा विचार करा; एखादी गोष्ट लक्षात आली नाहीतर, श्रोता या शब्दाचा उपयोग करून, वाक्याला लक्ष देण्यास सांगत असेल परंतु यहूदी आपल्या द्वेष आणि खोडसाळ वृत्तीमुळे या शब्दाला थोडेसे बिघडवून उपयोगात आणत होते, ज्यामुळे त्याच्या अर्थात बदल आणि त्यांच्या खोडसाळ वृत्तीचे समाधान होऊन जात असे. उदा.ते म्हणत असत 'राईना' (आमच्या गुराख्या!) किंवा राअिना मूर्ख वगैरे; जसे ते

अस्‌सलाम अलैकुम'' ऐवजी, 'अस्साम् अलैकुम, (तुमच्यावर मृत्यू येवो) म्हणत असत. अल्लाहतआलाने फर्माविले, तुम्ही 'उन्‌जुर्ना' म्हणत जा. यावरून हे धार्मिक तत्त्व ठाऊक झाले की, ज्या शब्दांनी आक्षेपार्ह आणि अपमानाचा संशय येईल, अशा शब्दाचा वापर, मान सन्मान व प्रतिष्ठेला दृष्टीसमोर ठेवून, यांचा उपयोग योग्य नाही. दुसरे धार्मिक तत्त्व हे सिद्ध झाले की काफिरांसमवेत त्यांच्यासारखे अनुकरण करण्यापासून स्वत:ला वांचविले पाहिजे. ''जो कोण्या समाजाशी साधर्म्य राखील, तो त्यांच्यापैकीच गणला जाईल'' (यात ईमानवाल्यांचा सहभाग नसावा, अबुदाऊद)

२) ''नस्ख'' चा शब्दकोशांतील अर्थ तर, नक्कल करण्याचा आहे. परंतु धर्मशास्त्रीय परिभाषेत त्याचा अर्थ एका हुकूमाला रद्द करून, दुसरा हुकूम जारी करण्याचा आहे. हा बदल (नस्ख), अल्लाहतआलाकडून झाला आहे. जसे, ह.आदम ﷵ च्या काळी, सख्या, बहीणभावांचा विवाह करणे योग्य होते; नंतर त्याला निषीद्ध ठरविण्यात आले, वगैरे. याचप्रमाणे कुरआनामध्ये, अल्लाहतआलाने काही हुकूमांना रद्द (नस्ख) करून, त्यांच्या जागी नवा हुकूम जारी केला. त्यांच्या संख्येत, मतभेद आहेत; शाह वलीउल्लाह (رحمہ اللہ علیہ) नी 'अल फौजुल कबीर' मध्ये, यांची संख्या फक्त पाच सांगितली आहे. हा 'नसख' (फेरबदल) तीन प्रकारचा आहे. एक तर ''मुत्‌लकन नस्खे हुकूम'' म्हणजे एका हुकूमाला बदलून, दुसरा हुकूम जारी करण्यात आला. दुसरा ''नस्ख मअ तिलावत'' म्हणजे पहिल्या हुकूमाचे शब्द, कुरआनमध्ये, तसेच ठेवण्यात आले, आहेत; त्याचे पठन (तिलावत) होत आहे. परंतु दुसरा हुकूम जो नंतर सादर करण्यात आला, तो पण कुरआनांत तसाच आहे. म्हणजे रद्द करणारी आणि रद्द झालेली दोन्ही महावाक्ये कुरआनात तशीच आहेत. ''नस्ख'' चा एक तिसरा प्रकार हा आहे की तिलावत (पठण) रद्द करण्यात आले; म्हणजे कुरआन करीममध्ये, नबी ﷺ नी त्यांना शामील केले नाही; परंतु त्यांचा हुकूम तसाच बाकी राखण्यात आला उदा. ''विवाहीत स्त्री पुरूष जर व्याभिचार करतील, तर खचितच् त्यांना धोंडमार केली जावी.'' (मौता इमाम मालिक) या वाक्यांत 'नसख्' च्या पहिल्या दोन प्रकारचा उल्लेख आहे. 'मा नन्सख मिन् आयातिन' मध्ये, दुसरा प्रकार आणि 'औनुंसिहा' मध्ये पहिला प्रकार, 'नुन्‌सिहा' (आम्ही विसरवून देतो) चा अर्थ आहे, याचा हुकूम आणि तिलावत दोन्ही रद्द करण्यात आले आहे. जणू काय, आम्ही त्याला विसरवून दिले; आणि नवा हुकूम जारी केला. किंवा नबी ﷺ च्या हृदयातूनच त्याला मिटवून टाकले. (नसियन मनसिया) आणि त्याला नव्याने बदलून दिले. यहूदी तौरातला ना काबिले नस्ख म्हणजे कधीही रद्द न होणारा म्हणत होते. आणि कुरआनावर पण त्यांनी, काही आदेश रद्द होण्याच्या कारणाने, आक्षेप घेतला. अल्लाहतआलाने त्यांचे खंडन केले; आणि सांगितले पृथ्वी आणि आकाशाचे राज्य, त्याच्याच हातात आहे. तो जे योग्य वाटेन ते करील. ज्यावेळी जो हुकूम त्याच्या इराद्यानुसार बुद्धीयुक्ततेप्रमाणेअसेल, त्याला जारी करेन, आणि ज्या (हुकूमा) ला इच्छेल, त्याला रद्द करेल. हे त्याच्या सामर्थ्याचे एक प्रकटीकरण आहे. काही प्राचिन मार्ग भटकलेले, (उदा. अबु मुस्‌लिम अस्‌फहानी मुअ्‌तज़ली) आणि आज कालचे सुद्धा काही, धर्मांत मर्यादेपेक्षा पुढे जाणारे (मुतजद्देदीन) ने सुद्धा कुरआनात 'नस्ख' (रद्द करण्या) ला यहूद्यांप्रमाणेच नाकारले आहे. परंतु खरी गोष्ट तीच आहे; जी वरील वाक्यांत सांगितली गेली आहे. पूर्वींच्या पुण्यवान आणि परहेजगार (सलफ सालेहिन) लोकांची श्रद्धा (अकीदा) पण 'नसख्' चे समर्थन करणारेच राहिले आहे.

३) मुसलमानांना (सहाबांना) खबरदार केले जात आहे; की यहूद्यांसारखे तुम्ही आपल्या पैगंबरांना (उदंडपणे) शिरजोरपणे अनावश्यक प्रश्न विचारत जाऊ नका. यात, कुफ्र होण्याचा अंदेशा आहे.

४) यहूद्यांना इस्लाम आणि नबी ﷺ शी जो द्वेष आणि खोडसाळ वृत्ति होती; याचमुळे ते मुसलमानांना, इस्लाम धर्माकडून फिरवून, देण्याचा सतत प्रयत्न करीत असत. मुसलमानांना सांगण्यात येत आहे की, तुम्ही धैर्य आणि दुर्लक्ष करून इस्लाममधील आदेश आणि अनिवार्य गोष्टीवर अंमलबजावणी करीत रहा; ज्यांचा तुम्हाला हुकूम देण्यात आला आहे.

५) याठिकाणी, ग्रंथधारी लोकांच्या ते गर्व व स्वत:लाच फसविण्याला पुन्हा; सांगण्यात येत आहे, ज्यांत ते गुरफटले होते. अल्लाहतआलाने म्हटले या त्यांच्या केवळ आकांक्षा आहेत; ज्यांकरीता यांच्या जवळ कुठलाही पुरावा नाही.

६) ''अस्लमा वज्हहू लिल्लाहे'' चा अर्थ आहे केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी काम केले जावे. ''वहुव मोहसिनुन'' चा अर्थ आहे पैगंबरांच्या ﷺ च्या सुन्नतप्रमाणे, कर्म मान्य होण्यासाठी, हे या जगांतील हे मूळ तत्त्व आहे; आणि शेवटची मुक्ती, याच तत्त्वाप्रमाणे केली गेली, त्या नेक कृत्यांवर अवलंबून आहे; आणि केवळ आशा आकांक्षावर अवलंबून नाही.

وَقَالَتِ الْيَهُوْدُ لَيْسَتِ النَّصٰرٰى عَلٰى شَيْءٍ ۖ وَّقَالَتِ
النَّصٰرٰى لَيْسَتِ الْيَهُوْدُ عَلٰى شَيْءٍ ۙ وَّهُمْ يَتْلُوْنَ الْكِتٰبَ ۭ
كَذٰلِكَ قَالَ الَّذِيْنَ لَا يَعْلَمُوْنَ مِثْلَ قَوْلِهِمْ ۚ فَاللّٰهُ
يَحْكُمُ بَيْنَهُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ فِيْمَا كَانُوْا فِيْهِ يَخْتَلِفُوْنَ ۝١١٣

**यहूदी म्हणतात की, ख्रिस्ती सत्यावर नाहीत[१]; आणि ख्रिस्ती म्हणतात की यहूदी सत्यावर नाहीत. वास्तविक हे लोक पुस्तक (तौरात व इंजिल) वाचतात; याचसारखी गोष्ट अज्ञानी (लोक) पण सांगत असतात[२]. कयामतच्या दिवशी अल्लाहतआला त्यांच्या या मतभेदाचा निर्णय त्यांच्या दरम्यान करून देईन (११३)**

وَمَنْ اَظْلَمُ مِمَّنْ مَّنَعَ مَسٰجِدَ اللّٰهِ اَنْ يُّذْكَرَ فِيْهَا اسْمُهٗ
وَسَعٰى فِيْ خَرَابِهَا ۭ اُولٰۗىِٕكَ مَا كَانَ لَهُمْ اَنْ يَّدْخُلُوْهَآ
اِلَّا خَاۗىِٕفِيْنَ ڛ لَهُمْ فِي الدُّنْيَا خِزْيٌ وَّلَهُمْ فِي الْاٰخِرَةِ
عَذَابٌ عَظِيْمٌ ۝١١٤

**त्यापेक्षाही आणखी जालीम कोण आहे; जो अल्लाहतआलाच्या मशिदींमध्ये अल्लाहतआलाचे स्मरण करण्यापासून मना करील[३]; आणि त्यांना बरबाद[४] करण्याचा प्रयत्न करील; अशा लोकांना (अल्लाहचे) भय बाळगतच, त्यांच्यात दाखल व्हावयास[५] पाहिजे; तथापि अशा लोकांसाठी या जगांत पण फटफजिती आहे, आणि परत्री पण मोठे मोठे प्रकोप आहेत (११४)**

१) यहूदी तौरात वाचतात; ज्याच्यात ह.मूसा ﷺ कडून ह.ईसा ﷺ ला मान्यता देणे आलेले आहे. तरी असे असून सुद्धा, यहूदी ह.ईसा ﷺ ला नाकारत होते. ख्रिस्त्यांजवळ इंजील सध्या अस्तित्वात आहे; ज्यात ह.मूसा ﷺ ला आणि तौरातला अल्लाहकडून होण्याची मान्यता आहे. असे असताना सुद्धा ते, यहूद्यांना नाकारत होते. म्हणजे ग्रंथधारी लोकांच्या दोन्ही गटात एक दुसऱ्याला नाकारणे व खोडसाळ वृत्ती आणि आपल्या आपल्या बाबतीत स्वत:ला फारच चांगले समजत होते. (खुशफहमी)

२) ग्रंथधारी लोकांच्या मानाने, अरबचे बहुदेववादी निरक्षर होते. म्हणून त्यांना अज्ञानी म्हटले गेले. परंतु ते पण बहुदेववादी असून सुद्धा, यहूदी आणि ख्रिस्त्यांप्रमाणे या खोट्या गुमानमध्ये गुरफटलेले होते की, तेच सत्यावर आहेत. म्हणून ते नबी ﷺ ला 'साबी' म्हणजे ज्याचा कुठलाही धर्म नाही असा म्हणजे 'बेदीन' म्हणत असत.

३) ज्या लोकांनी मशिदींमध्ये अल्लाहचे नामस्मरण करण्यापासून मना केले; हे कोण आहेत? याबाबतीत भाष्यकारांची दोन मते आहेत. एक मत असे आहे की, याच्याने अभिप्रेत ख्रिस्ती आहेत; ज्यांनी रोमच्या बादशाहबरोबर संगनमत करून, बैतुल मुकद्दसमध्ये, यहूद्यांना नमाज पढण्यास मनाई केली आणि त्यांना बर्बाद करण्यांत भाग घेतला. इब्ने जरीरने या मताला मान्य केले आहे. परंतु हाफीज इब्ने कसीरने याउलट याचा रोख मक्केचे बहुदेववादी आहेत, असे म्हटले आहे. ज्यांनी नबी ﷺ ला आणि आपल्या साथीदारांना (सहाबा ﷺ) ला मक्केतून बाहेर पडण्यास भाग पाडले आणि अशा प्रकारे खाना ए काबामध्ये मुसलमानांना उपासना करण्याची मनाई केली. नंतर हुदैबियाच्या तहाच्यावेळीही असेच केले, आणि सांगितले की, आमच्या वाडवडीलांच्या खुन्यांना मक्केत प्रवेश करू देणार नाही. वास्तविक खाना ए काबामध्ये कुणाला, उपासनेची मनाई करण्याची परवानगी आणि पद्धत नव्हती.

४) खराबी व बर्बादी फक्त हिच नाही की, त्याला पाडून टाकण्यात यावे; आणि इमारतीचे नुकसान करण्यात यावे; परंतु त्यांत अल्लाहच्या उपासनेला आणि नामस्मरणाला मनाई करणे, धर्मशास्त्राला कायम करण्याच्या आणि शिर्क करण्यापासून पवित्र करण्याला मनाई करणे हे सर्व खराबी आणि अल्लाहच्या घरांना (मशिदींना) बर्बाद करणे होय.

५) हे शब्द बातमी देण्याचे आहेत; परंतु याने अभिप्रेत ही इच्छा आहे की, अल्लाहतआला जेव्हा तुम्हाला त्यांच्यावर विजय आणि वर्चस्व प्राप्त करून देईन, तेव्हा तुम्ही त्या बहुदेववाद्यांना त्यांत तह आणि जिझीया शिवाय राहण्याची परवानगी देऊ नये. जेव्हा ८ हिजरी ला मक्केवर विजय मिळाला, तेव्हा नबी ﷺ नी घोषणा केली, येत्या वर्षी, काबामध्ये कोण्याही बहुदेववाद्याला हज करण्याची, आणि नग्न प्रदक्षिणा घालण्याची परवानगी असणार नाही. आणि ज्याच्या बरोबर जो करार असेल, त्या कराराच्या मुदतीपर्यंत त्याला येथे रहाण्याची परवानगी आहे. काहींनी म्हटले आहे की, ही शुभवार्ता व भविष्यवाणी आहे; की, लवकरच मुसलमानांचे वर्चस्व प्रस्थापित होणार आहे. आणि हे बहुदेववादी खाना ए काबामध्ये भीत भीत प्रवेश करतील की, जे पूर्वी आम्ही मुसलमानांवर जो जोर जुलूम केलेला आहे; त्याच्या बदल्यात आम्हाला शिक्षेचा सामना किंवा ठार न मारून टाकले जावे. तथापि लवकरच ही शुभवार्ता पूर्णत्वास पोहचली.

وَلِلّٰهِ الْمَشْرِقُ وَالْمَغْرِبُ فَاَيْنَمَا تُوَلُّوْا فَثَمَّ وَجْهُ اللّٰهِ اِنَّ اللّٰهَ وَاسِعٌ عَلِيْمٌ ﴿١١٥﴾

**आणि पूर्व आणि पश्चिम अल्लाहसाठीच आहेत, तुम्ही जिकडे ही तोंड कराल, तिकडे अल्लाहचे तोंड आहे[१], अल्लाहतआला सर्वव्यापी व सर्वज्ञानी आहे.** ११५

وَقَالُوا اتَّخَذَ اللّٰهُ وَلَدًا سُبْحٰنَهٗ بَلْ لَّهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ كُلٌّ لَّهٗ قٰنِتُوْنَ ﴿١١٦﴾

**आणि ते म्हणतात की, अल्लाहतआलाची संतती आहे, (नाही या गोष्टीकडून) तो पवित्र आहे. पृथ्वी आणि आकांशातील सर्व निर्मिती त्याच्या आधिपत्याखाली आहे. आणि प्रत्येक त्याच्या आज्ञांकित आहे** ११६

بَدِيْعُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَاِذَا قَضٰٓى اَمْرًا فَاِنَّمَا يَقُوْلُ لَهٗ كُنْ فَيَكُوْنُ ﴿١١٧﴾

**तो पृथ्वी आणि आकाशाचा सुरवातीपासूनच निर्माणकर्ता आहे. तो जे काम करू इच्छेल सांगून टाकतो की, होऊन जा! आणि ते होऊन जाते[२]** ११७

وَقَالَ الَّذِيْنَ لَا يَعْلَمُوْنَ لَوْلَا يُكَلِّمُنَا اللّٰهُ اَوْ تَاْتِيْنَآ اٰيَةٌ كَذٰلِكَ قَالَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ مِّثْلَ قَوْلِهِمْ تَشَابَهَتْ قُلُوْبُهُمْ قَدْ بَيَّنَّا الْاٰيٰتِ لِقَوْمٍ يُّوْقِنُوْنَ ﴿١١٨﴾

**अशाचप्रकारे अज्ञानी लोकांनी पण म्हटले की, स्वत: अल्लाहतआला आमचेशी संभाषण का करीत नाही ? किंवा आमच्या जवळ कोणी निशाणी कां म्हणून येत नाही[३]? अशाच प्रकारची गोष्ट त्यांच्या पूर्वजांनी पण केली होती; त्यांची आणि यांची अंत:करणे एक सारखी होवून[४] गेली. आम्ही तर जे लोक भरोसा करतात, त्यांच्यासाठी निशाण्या वर्णन करून दिल्या** ११८

اِنَّآ اَرْسَلْنٰكَ بِالْحَقِّ بَشِيْرًا وَّنَذِيْرًا وَّلَا تُسْئَلُ عَنْ اَصْحٰبِ الْجَحِيْمِ ﴿١١٩﴾

**आम्ही आपणास सत्यासह खुषखबर देणारे आणि भिवविणारे बनवून पाठविले आहे. आणि नरकाग्नीत जाणाऱ्यांच्या बाबतीत आपली वास्तपूस होणार नाही.** ११९

१) हिजरत नंतर, जेव्हा मुसलमान आपले तोंड बैतुल मुकद्दसकडे करून, नमाज पढत असत; तर मुसलमानांना याचे दु:ख होते; यावेळेस हे महावाक्य अवतरीत झाले. काही म्हणतात की, त्यावेळी अवतरीत झाले, जेव्हा बैतुल मुकद्दसकडून पुन्हा खाना ए काबा कडे तोंड करून नमाज पढण्याचा हुकूम झाला, तर यहूद्यांनी तरह तरहच्या गोष्टी घडवल्या. काहींच्या जवळ याच्या अवतरणाचे कारण, प्रवासात स्वारीवर नफील नमाज पढण्याची परवानगी आहे. की, स्वारीचे तोंड कोठेही असो, नमाज पढूशकतात. कधी, काही कारणे एकत्र होऊन जातात; आणि त्या सर्वांच्या हुकुमासाठी एकच महावाक्य अवतरीत होते. अशा महावाक्यांचे अवतरणाची अनेक कारणे, सांगितली जातात. कुण्या एका रिवायतीत एक कारण सांगितले जाते; आणि कुण्या दुसरीत, दुसरेच कारण सांगितले जाते. हे महावाक्य पण याच वर्गातले आहे. (अहसनु त्तफासीर)

२) म्हणजे तो अल्लाह तर तो आहे; जो आकाशांत आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तूचा मालक आहे. प्रत्येक वस्तू त्याची आज्ञाधारक आहे. किंबहुना आकाश आणि पृथ्वीचा, कुठल्याही नमुन्याशिवाय, बनवणारा सुद्धा तोच आहे. याच्याशिवाय तो जे काम करू इच्छेल, त्याच्यासाठी फक्त शब्द 'कुन्' म्हणणे पुरेसे आहे. अशा व्यक्तीविशेषला, संततीची काय म्हणून गरज भासावी?

३) याच्याने अभिप्रेत, अरब बहुदेववादी आहेत; त्यांनी यहूद्यांसारखी मागणी केली की, अल्लाहतआला समोरासमोर आमच्याशी संभाषण का करीत नाही? किंवा एखादी मोठी निशाणी का दाखवून देत नाही ? जिला पाहून आम्ही मुसलमान होऊन जावे. ज्याप्रमाणे सू.बनीईस्राईल महावाक्य.९० ते ९३ मध्ये व इतर ठिकाणी पण वर्णन करण्यात आले आहे.

४) म्हणजे अरब बहुदेववाद्यांची अंत:करणे, कुफ्र आणि खोडसाळ वृत्तीत आणि जाणून बुझून नाकारण्यात आणि दोषारोपण करण्यात, आपल्या पूर्वीच्या लोकांच्या अंत:करणासारखी होऊन गेली होती. जसे सू.ज़ारियात-५२ मध्ये सांगण्यांत आले आहे की, ''याच्या पूर्वी जो पण पैगंबर आला; त्याला लोकांनी जादूगर किंवा वेडाच म्हटले; काय हे या गोष्टीची, एक दुसऱ्याला 'वसिअत' करून जात असत? नाही हे सर्व लोक शिरजोर आहेत'' किंबहुना यांच्यात एक दुसऱ्यांत शामील होण्यात शिरजोरीची भावना आहे. त्यामुळेच, सत्याचे आवाहन करणाऱ्यांपुढे, ते वेगवेगळ्या मागण्या करत असतात; किंवा त्यांना वेडे ठरवितात.

وَلَنْ تَرْضٰى عَنْكَ الْيَهُوْدُ وَلَا النَّصٰرٰى حَتّٰى
تَتَّبِعَ مِلَّتَهُمْ ؕ قُلْ اِنَّ هُدَى اللّٰهِ هُوَ الْهُدٰى ؕ
وَلَئِنِ اتَّبَعْتَ اَهْوَآءَهُمْ بَعْدَ الَّذِيْ جَآءَكَ مِنَ
الْعِلْمِ ۙ مَا لَكَ مِنَ اللّٰهِ مِنْ وَّلِيٍّ وَّلَا نَصِيْرٍ ﴿١٢٠﴾

आपणाशी यहूदी आणि खिस्ती कधीही राजी होणार नाही; येथपावेतो, तुम्ही त्यांच्या धर्माच्या अंकीत होऊन जाणार नाही[१]. आपण सांगून टाका की, अल्लाहचे मार्गदर्शनच[२] मार्गदर्शन आहे. आणि जर तुम्ही, आपल्याजवळ ज्ञान आल्यावर सुद्धा, त्यांच्या इच्छेचे अनुकरण केले; तर तुमच्यासाठी अल्लाहजवळ तुमचा कोणी मित्र आणि मददगार[३] असणार नाही (१२०)

اَلَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ يَتْلُوْنَهٗ حَقَّ تِلَاوَتِهٖ ؕ
اُولٰٓئِكَ يُؤْمِنُوْنَ بِهٖ ؕ وَمَنْ يَّكْفُرْ بِهٖ فَاُولٰٓئِكَ
هُمُ الْخٰسِرُوْنَ ﴿١٢١﴾ ع ١٤ ٩ ١٤

ज्यांना आम्ही पुस्तक[४] दिले आहे, आणि ते त्याला जसे वाचावयांस पाहिजे, तसे वाचत असतात[५]; ते या पुस्तकावर पण ईमान आणतात; आणि जो याला नाकारील, तो (आपलेच) नुकसान[६] करून घेईन (१२१) १४ ९ १४

يٰبَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ اذْكُرُوْا نِعْمَتِيَ الَّتِيْٓ اَنْعَمْتُ عَلَيْكُمْ
وَاَنِّيْ فَضَّلْتُكُمْ عَلَى الْعٰلَمِيْنَ ﴿١٢٢﴾

हे याकूबच्या संतती! मी ज्या देणग्या तुम्हाला दिल्या आहेत, त्यांना आठवा. आणि मी साऱ्या जगांत (आलम दुनियेत), तुम्हाला श्रेष्ठत्व देऊन ठेवले होते. (१२२)

وَاتَّقُوْا يَوْمًا لَّا تَجْزِيْ نَفْسٌ عَنْ نَّفْسٍ شَيْئًا وَّلَا
يُقْبَلُ مِنْهَا عَدْلٌ وَّلَا تَنْفَعُهَا شَفَاعَةٌ وَّلَا هُمْ
يُنْصَرُوْنَ ﴿١٢٣﴾

त्या दिवसाचे भय बाळगा, ज्या दिवशी, कुठलाही जीव, दुसऱ्या कुठल्याही जीवाला फायदा पोहचवू शकणार नाही. आणि न कोण्या व्यक्तीकडून प्रतिपादन, कबूल केले जाईल. आणि न कोणाची शिफारस त्याला नफा पोहचवील, न त्यांची मदत केली जाईल (१२३)

وَاِذِ ابْتَلٰٓى اِبْرٰهٖمَ رَبُّهٗ بِكَلِمٰتٍ فَاَتَمَّهُنَّ ؕ قَالَ
اِنِّيْ جَاعِلُكَ لِلنَّاسِ اِمَامًا ؕ قَالَ وَمِنْ ذُرِّيَّتِيْ ؕ قَالَ
لَا يَنَالُ عَهْدِي الظّٰلِمِيْنَ ﴿١٢٤﴾

जेंव्हा इब्राहीम (अ.) ला, त्यांच्या पालनकर्त्याने, कित्येक गोष्टीत अजमाविले[७]; आणि ते सर्वांत उत्तीर्ण झालेत, तेव्हा अल्लाहतआलाने म्हटले की, मी तुम्हांस लोकांचा इमाम बनवून टाकेन. (ह.इब्राहीम अ.) ने म्हटले आणि माझ्या संततीमधून[८]? अल्लाहतआलाने म्हटले माझा हा वायदा जालीमांकरीता नाही (१२४)

وَاِذْ جَعَلْنَا الْبَيْتَ مَثَابَةً لِّلنَّاسِ وَاَمْنًا ؕ وَاتَّخِذُوْا
مِنْ مَّقَامِ اِبْرٰهٖمَ مُصَلًّى ؕ وَعَهِدْنَآ اِلٰٓى اِبْرٰهٖمَ
وَاِسْمٰعِيْلَ اَنْ طَهِّرَا بَيْتِيَ لِلطَّآئِفِيْنَ وَالْعٰكِفِيْنَ
وَالرُّكَّعِ السُّجُوْدِ ﴿١٢٥﴾

आम्ही बैतुल्लाहला लोकांसाठी पुण्य आणि सुखशांतीचे घर[९] बनविले. तुम्ही मुक़ामे इब्राहीम ला (आपल्या) नमाजीची जागा मुकर्रर करून[१०] घ्या. आम्ही इब्राहीम (अ.) व इस्माईल (अ.) कडून वचन घेतले की, तुम्ही माझ्या घराला तवाफ करणाऱ्यांसाठी, एतेकाफ करणाऱ्यांसाठी आणि रूकूअ सज्दा करणाऱ्यांसाठी, पाक साफ ठेवा. (१२५)

१) म्हणजे यहूदियत्व, किंवा ख्रिस्तीत्व अंगिकारावे.

२) जी आता, इस्लामच्या स्वरूपांत आहे; ज्याचे नबी करीम ﷺ आवाहन करीत आहे; त्या बिघडलेल्या यहूदीयत किंवा बिघडलेल्या इसाईयतकडे नाही,ज्याचा उल्लेख सू. आले इमरान महावाक्य ८५ मध्ये वर्णन करण्यात आला आहे.

३) या गोष्टीवर खबरदार करण्यात येत आहे की, ज्ञान प्राप्त झाल्यावर सुद्धा, त्या लोकांना, खूष करण्यासाठी, जे स्वत: चुकीवर आहेत, त्यांचे अनुकरण केले, तर आपला कोणी मददगार राहणार नाही. वास्तविक हे, उम्मते मोहंमदियाला सावध करण्यात येत आहे की, बिदअत करणाऱ्यांना, खूष करण्यासाठी, त्यांनी पण असे काम करू नये. तसेच धर्मांत बळजबरी ओढून तानून एखाद्या मनघडत गोष्टीला सत्य साबित करण्याचा प्रयत्न करू नये.

४) ग्रंथधारी लोकांतून जे आपल्या धर्माचे अनुकरण न करणारे होते, त्यांच्या वाईट चारित्र्य आणि कर्तृत्वाचे, आवश्यक स्पष्टीकरण केल्यानंतर त्यांच्यात जे काही, पुण्यवान आणि चांगल्या कर्तृत्वाचे होते, या महावाक्यांत त्यांचा चांगुलपणा; आणि त्यांच्या विश्वासू होण्याची खुषखबर देण्यात येत आहे. त्यांच्यात अब्दुल्लाह बिन सलाम رضي الله عنه आणि त्यांच्यासारखे, दुसरे लोक आहेत. ज्यांना यहूद्यांमधून, इस्लाम कबूल करण्याचा दैवयोग प्राप्त झाला.

५) ''ते अशाप्रकारे वाचतात, जसे वाचले पाहिजे.'' चे कित्येक अर्थ सांगण्यात आले आहेत. उदा.

(१)खूप लक्ष देऊन, आणि चिंतन करून वाचतात. स्वर्गाचे वर्णन येते, तेव्हा अल्लाहजवळ स्वर्गाची मागणी करतात; आणि नर्काचा उल्लेख येतो तेव्हा नर्कापासून पनाह मागतात. (२) त्याच्या विहीत (हलाल) ला विहीत, आणि त्याच्या निशीद्ध (हराम) ला निशीद्ध समजतात; आणि ईशवाणीत हेरफेर करीत नाही (जसे दुसरे यहूदी करत असत.) (३) त्याच्यात, जे काही सांगितले आहे, ते लोकांना सांगत असतात. याची कुठलीही गोष्ट लपवीत नाहीत (४) यांच्या आदेशीत गोष्टींची अंमलबजावणी करतात; आणि त्या वाक्यांवर ईमान ठेवतात; ज्यांचा अर्थ अल्लाहतआलाशिवाय, कोणी जाणत नाही. आणि ज्या गोष्टी लक्षात येत नाही; त्या धर्मपंडीतांकडून समजाऊन घेतात. (५) याच्या एक एक गोष्टीवर अंमलबजावणी करतात किंवा एक एक गोष्टीला मान्यता देतात (फत्हुल कदीर) खरोखरच असे आहे की, वाचनाच्या हक्कांत हे सर्व विषय येतात; आणि मार्गदर्शन (हिदायत) पण अशाच लोकांना मिळते; जेव्हा वर उल्लेख केलेल्या गोष्टी लक्षांत घेऊन वाचन करतात.

६) ग्रंथधारी लोकांपैकी, जो नबी ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणणार नाही; तो नरकाग्नीत जाईल. (इब्ने कसीर)

७) 'कलमात' ने अभिप्रेत धर्मशास्त्राचे आदेश, हजच्या वेळी करावयाची कामे, मुलाची जबह, अल्लाहच्या धर्मासाठी, मातृभूमी, घरदार, नातेवाईक सोडून दुसऱ्या ठिकाणी जाणे (हिजरत), नमरूदने (ह.इब्राहीम عليه السلام साठी) पेटविलेला अग्नी, वगैरे वगैरे, त्या सर्व कसोट्या आहेत; ज्यांच्यातून ह.इब्राहीम عليه السلام ला पसार व्हावे लागले. आणि ते कसोटीत यशस्वी झालेत. ज्याच्यामुळे, बदल्यात इमामून नास् (लोकांचे पेशवा) च्या गादीवर विराजमान झाले. त्यामुळेच मुसलमानच फक्त नाही तर, यहूदी, खिस्ती, येथपावेतो की, अरबचे बहुदेववादी सर्वच, त्यांच्या आदरणीय व्यक्तीमत्वाला आणि त्यांच्या इमाम होण्याला मान्यता देतात.

८) अल्लाहतआलाने ह.इब्राहीम عليه السلام च्या त्या, इच्छेला पूर्ण केले; ज्याचा उल्लेख कुर्आन मजीदमध्ये आहे. ''आम्ही पैगंबरीला आणि पुस्तकाला, (वह्य) त्यांच्या संततीमध्ये खास करून दिले.'' (सू. अन्कबूत-२७) अर्थात प्रत्येक पैगंबर, ज्याला अल्लाह ने पाठविले, आणि प्रत्येक पुस्तक जे ह.इब्राहीम عليه السلام नंतर अवतरीत झाले; ह.इब्राहीम عليه السلامच्या संततीच याची शृंखला राहिली. (इब्ने कसीर) या बरोबरच हेही सांगितले की ''हा माझा वायदा जालीमांबरोबर नाही.'' या हुकूमाचे स्पष्टीकरण करून दिले की, ह.इब्राहीम عليه السلام ची एवढी मोठी शान व अल्लाहजवळचे त्यांचे स्थान, असताना सुद्धा, ह.इब्राहीम عليه السلامच्या संततीतून जे, आईबापांची आज्ञा न पाळणारे, जालीम आणि बहुदेववादी (मुशरिक) असतील, त्यांच्या दुर्दैवाला (शकावत) आणि निराशेला दूर करणारा कोणी असणार नाही. अल्लाहतआलाने येथे पैगंबराची संतती होण्याच्या महत्त्वाला, ठोकरून लावले आहे; जर ईमान आणि सत्कृत्ये नाही तर पिरजादगी, साहिबजादगी असण्याची, अल्लाहतआलाच्या दरबारी काय किंमत असेल ? नबी ﷺ नी सांगितले की, ''ज्याला त्याचे कृत्य (अमल) मागे सोडून टाकून देईल, त्याचे खान्दान त्याला पुढे करू शकत नाही.'' (स. मुस्लिम)

९) ह.इब्राहीम عليه السلام च्या संदर्भात, जे याचे बांधणारे आहे, बैतुल्लाहची दोन वैशिष्टे, येथे सांगितली आहेत. एक लोकांसाठी पुण्याचे स्थान,आणि दुसरा अर्थ आहे, वारंवार, परत फिरून येण्याचे ठिकाण. जो एकदां बैतुल्लाहचे दर्शन घेतो; दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदा, येण्यासाठी व्याकूळ होतो. ही अशी आवड आहे, जिचे कधी समाधानच होत नाही. किंबहुना रोज ती वाढतच राहते. दुसरे वैशिष्ट्य, 'शांतीचे स्थान' , म्हणजे येथे कोण्या शत्रूकडून भय रहात नाही. किंबहुना, अज्ञान काळांत सुद्धा, लोक बैतुल्लाहच्या हद्दीत, कोण्या जानी दुष्मनाचापण बदला घेत नसत. इस्लामने याच्या या प्रतिष्ठेला बाकी ठेवले; किंबहुना याची आणखी ताकीद केली.

१०) मकामे इब्राहीमने, अभिप्रेत, तो दगड आहे; ज्यावरून उभे राहून ह.इब्राहीम عليه السلام काबा बांधण्याचे काम करीत होते. या दगडावर ह.इब्राहीम عليه السلام च्या पावलांच्या खुणा आहेत. आता, या दगडाला, कांचेत सुरक्षित करून देण्यात आले आहे. प्रत्येक हाजी सतत तवाफच्या दरम्यान, सहजतेने त्या दगडाला पाहूशकतो. तवाफ पूर्ण केल्यानंतर या ठिकाणी दोन रकात नमाज़ पढणे सुन्नत आहे.

وَاِذْ قَالَ اِبْرٰهٖمُ رَبِّ اجْعَلْ هٰذَا بَلَدًا اٰمِنًا وَّارْزُقْ اَهْلَهٗ مِنَ الثَّمَرٰتِ مَنْ اٰمَنَ مِنْهُمْ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِؕ قَالَ وَمَنْ كَفَرَ فَاُمَتِّعُهٗ قَلِيْلًا ثُمَّ اَضْطَرُّهٗۤ اِلٰى عَذَابِ النَّارِؕ وَبِئْسَ الْمَصِيْرُ ﴿١٢٦﴾

**जेव्हा इब्राहीम (अ) नी प्रार्थना केली की, हे (माझ्या) पालनकर्त्या! तू या जागेला, सुखशांतीचे शहर बनव; आणि येथे वस्ती करून, राहणाऱ्यांना, जे अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसांवर विश्वास ठेवत असतील; (त्यांना) फळांची रोजी[१] दे; अल्लाहतआलाने म्हटले, मी काफिरांना पण थोडा फायदा पोहचवीन; मग त्यांना अग्नीच्या शिक्षेकडे निराश करून पोहचवून देईन; हे पोहचवण्याचे ठिकाण (कितीतरी) वाईट आहे. ﴿१२६﴾**

وَاِذْ يَرْفَعُ اِبْرٰهٖمُ الْقَوَاعِدَ مِنَ الْبَيْتِ وَاِسْمٰعِيْلُؕ رَبَّنَا تَقَبَّلْ مِنَّاؕ اِنَّكَ اَنْتَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿١٢٧﴾

**इब्राहीम (अ.) व इस्माईल (अ.) काबाचा पाया, आणि (त्याच्या) भिंती, बांधत होते, आणि प्रार्थना करीत होते की, हे आमच्या पालनकर्त्या! तूआमचे (हे बांधणे) कबूल कर; तूच ऐकणारा आणि जाणणारा आहेस ﴿१२७﴾**

رَبَّنَا وَاجْعَلْنَا مُسْلِمَيْنِ لَكَ وَمِنْ ذُرِّيَّتِنَاۤ اُمَّةً مُّسْلِمَةً لَّكَ۪ وَاَرِنَا مَنَاسِكَنَا وَتُبْ عَلَيْنَاۚ اِنَّكَ اَنْتَ التَّوَّابُ الرَّحِيْمُ ﴿١٢٨﴾

**हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास, आपला आज्ञाधारक बनवून घे; आणि आमच्या संततीतून, एका जमातीला पण आज्ञाधारक बनव. आणि आपल्या उपासना शिकव. आणि आमचा पश्चात्ताप मान्य कर. तू पश्चात्ताप मान्य करणारा आणि दयाळू आहेस ﴿१२८﴾**

رَبَّنَا وَابْعَثْ فِيْهِمْ رَسُوْلًا مِّنْهُمْ يَتْلُوْا عَلَيْهِمْ اٰيٰتِكَ وَيُعَلِّمُهُمُ الْكِتٰبَ وَالْحِكْمَةَ وَيُزَكِّيْهِمْؕ اِنَّكَ اَنْتَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿١٢٩﴾ ع ١٥

**हे आमच्या पालनकर्त्या! यांच्यात, यांच्यातूनच एक पैगंबर पाठव[२]; जो यांना तुझी महावाक्ये वाचून दाखवीन; आणि पुस्तक आणि ज्ञान[३] शिकवेल आणि त्यांना पवित्र करीन[४]. नि:संशय तू सामर्थ्यवान आणि बुद्धीवान आहेस ﴿१२९﴾**

وَمَنْ يَّرْغَبُ عَنْ مِّلَّةِ اِبْرٰهٖمَ اِلَّا مَنْ سَفِهَ نَفْسَهٗؕ وَلَقَدِ اصْطَفَيْنٰهُ فِى الدُّنْيَاۚ وَاِنَّهٗ فِى الْاٰخِرَةِ لَمِنَ الصّٰلِحِيْنَ ﴿١٣٠﴾

**इब्राहीम (अ.) च्या धर्मापासून, तोच लगाव ठेवणार नाही, जो निरा मूर्ख असेल; आम्ही तर त्याला दुनियेत सुद्धा प्रतिष्ठीत केले होते; आणि परलोकांत पण तो पुण्यवानांमधून आहे[५]. ﴿१३०﴾**

१) अल्लाहतआलाने, ह.इब्राहीम عليه السلام च्या दुआ कबूल केल्या. हे शहर शांतीचा पाळणा पण आहे. आणि ही नापिक (ओसाड) जागा असून सुद्धा येथे दुनियाभरची फळफळावळ आणि प्रत्येक प्रकारचे अन्न धान्याची विपुलता आहे; ज्याला पाहून मनुष्य आश्चर्यचकीत होऊन जातो.

२) ही ह.इब्राहीम عليه السلام व ह.इस्माईल عليه السلام ची शेवटची प्रार्थना आहे. ही पण अल्लाहतआलाने कबूल केली. ह.इस्माईल عليه السلام च्या संततीतून ह.मोहम्मद रसूल्लुल्लाह ﷺ ला पैगंबर बनवून पाठविले गेले. यासाठी नबी ﷺ नी सांगितले, ''मी माझे वडील, ह.इब्राहीम عليه السلام ची प्रार्थना, ह. ईसा عليه السلام ची शुभवार्ता आणि माझ्या आईचे स्वप्न आहे.'' (मुसनद अहमद इब्ने कसीरच्या हवाल्याने)

३) पुस्तकाने अभिप्रेरीत कुर्आन मजीद आणि हिकमतने (बुध्दिमत्ता) अभिप्रेरीत हदीस आहे. या महावाक्याचे वाचन केल्यानंतर कुर्आन व हदीसीच्या वर्णनाने माहित होते की, कुरआन शरीफचे वाचनसुद्धा, पुण्यप्राप्तीला कारणीभूत आहे. तरी सुद्धा कुर्आनाचा अर्थ लक्षांत आला (सुबहानल्लाह्) तरी दुधांत साखर पडण्यासारखे आहे. पण जर कुरआनाचे भाषांतर आणि अर्थ येत नाही; तरी सुद्धा याच्या वाचनांत कोताही योग्य नाही. तिलावत (कुरआनाचे वाचन) स्वत:च एक वेगळे आणि पुण्याचे काम आहे. तथापि याचा उद्देश्य आणि अर्थ पण समजण्याचा यथाशक्ती प्रयत्न केला पाहिजे.

४) वाचन आणि पुस्तकाचे (कुरआनाचे) शिक्षण आणि हदीसीच्या शिक्षणानंतर आपल्या हुजूर ﷺ ला पाठविण्याचा हा चौथा उद्देश्य आहे; की त्यांना शिर्क आणि अंधश्रध्देच्या घाणीपासून तसेच चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या कोताहीपासून पाक साफ केले जावे.

५) याठिकाणी अल्लाहतआला ह.इब्राहीम عليه السلام चे ते मोठेपण आणि श्रेष्ठत्वाचे वर्णन करीत आहे, जे अल्लाहतआलाने त्यांना इहलोकांत आणि परलोकांत दिले आहे. आणि हे पण स्पष्ट करून दिले की, मिल्लते इब्राहीमवर आक्षेप आणि त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे मूर्खांचे काम आहे. कोण्या बुद्धीमंतांकडून याची कल्पना केली जाऊ शकत नाही.

إِذْ قَالَ لَهُۥ رَبُّهُۥٓ أَسْلِمْ ۖ قَالَ أَسْلَمْتُ لِرَبِّ ٱلْعَٰلَمِينَ ﴿١٣١﴾

**जेव्हा कधी त्यांच्या पालनकर्त्याने सांगितले आज्ञांकीत होऊन जा; त्यांनी म्हटले मी सकल जगांच्या पालनकर्त्याचा आज्ञांकित झालो[१] (१३१)**

وَوَصَّىٰ بِهَآ إِبْرَٰهِۦمُ بَنِيهِ وَيَعْقُوبُ يَٰبَنِىَّ إِنَّ ٱللَّهَ ٱصْطَفَىٰ لَكُمُ ٱلدِّينَ فَلَا تَمُوتُنَّ إِلَّا وَأَنتُم مُّسْلِمُونَ ﴿١٣٢﴾

**आणि याच गोष्टीची वसिअत ह.इब्राहीम (अ.) व ह.याकूब (अ.) नी आपल्या मुलांना केली, हे आमच्या मुलांनो! अल्लाह तआलाने या धर्माला तुमच्यासाठी पसंत केले आहे. खबरदार! जर तुम्ही (मराल) तर मुसलमानच (असतांना) मरा[२]. (१३२)**

أَمْ كُنتُمْ شُهَدَآءَ إِذْ حَضَرَ يَعْقُوبَ ٱلْمَوْتُ إِذْ قَالَ لِبَنِيهِ مَا تَعْبُدُونَ مِنۢ بَعْدِى ۖ قَالُوا۟ نَعْبُدُ إِلَٰهَكَ وَإِلَٰهَ ءَابَآئِكَ إِبْرَٰهِۦمَ وَإِسْمَٰعِيلَ وَإِسْحَٰقَ إِلَٰهًا وَٰحِدًا وَنَحْنُ لَهُۥ مُسْلِمُونَ ﴿١٣٣﴾

**काय तुम्ही ह.याकूब (अ.) च्या मृत्यूच्यावेळी (तेथे) हजर होता? जेव्हा[३] त्यांनी आपल्या मुलांना सांगितले की, माझ्यानंतर तुम्ही कोणाची उपासना करणार? तर सर्वांनी उत्तर दिले की, तुमच्या उपास्याची आणि तुमचे वाडवडील ह.इब्राहीम (अ.) व ह.इस्माईल (अ.) आणि ह.इस्हाक (अ.) च्या उपास्याची. जो फक्त एकच उपास्य आहे; आणि आम्ही त्याचेच आज्ञांकीत बनून राहू. (१३३)**

تِلْكَ أُمَّةٌ قَدْ خَلَتْ ۖ لَهَا مَا كَسَبَتْ وَلَكُم مَّا كَسَبْتُمْ ۖ وَلَا تُسْـَٔلُونَ عَمَّا كَانُوا۟ يَعْمَلُونَ ﴿١٣٤﴾

**हा समूह तर होऊन गेला; जे त्यांनी केले, ते त्यांच्यासाठी आहे; आणि जे तुम्ही कराल ते तुमच्यासाठी आहे. त्यांच्या कर्माबद्दल तुम्हास विचारण्यात येणार नाही[४] (१३४)**

وَقَالُوا۟ كُونُوا۟ هُودًا أَوْ نَصَٰرَىٰ تَهْتَدُوا۟ ۗ قُلْ بَلْ مِلَّةَ إِبْرَٰهِۦمَ حَنِيفًا ۖ وَمَا كَانَ مِنَ ٱلْمُشْرِكِينَ ﴿١٣٥﴾

**हे म्हणतात की, यहूदी वा ख्रिस्ती बनून जा; मार्गदर्शन (हिदायत) प्राप्त कराल; आपण सांगून टाका की, आम्ही सरळ मार्गावर ह. इब्राहीम (अ.) च्या समाजवाले आहोत; आणि ह.इब्राहीम (अ.) फक्त अल्लाहचीच उपासना करणारे होते आणि बहुदेववादी[५] (मुशरिक) नव्हते. (१३५)**

قُولُوٓا۟ ءَامَنَّا بِٱللَّهِ وَمَآ أُنزِلَ إِلَيْنَا وَمَآ أُنزِلَ إِلَىٰٓ إِبْرَٰهِۦمَ وَإِسْمَٰعِيلَ وَإِسْحَٰقَ وَيَعْقُوبَ وَٱلْأَسْبَاطِ وَمَآ أُوتِىَ مُوسَىٰ وَعِيسَىٰ وَمَآ أُوتِىَ ٱلنَّبِيُّونَ مِن رَّبِّهِمْ لَا نُفَرِّقُ بَيْنَ أَحَدٍ مِّنْهُمْ وَنَحْنُ لَهُۥ مُسْلِمُونَ ﴿١٣٦﴾

**हे मुसलमानांनो ! तुम्ही सर्व सांगा की, आम्ही अल्लाहवर ईमान आणले; आणि त्या वस्तूवर पण, जी आमच्याकडे उतारण्यात आली; आणि जी गोष्ट ह.इब्राहीम (अ.), ह.इस्माईल (अ.) ह.इस्हाक (अ.) ह.याकूब (अ.) आणि त्यांच्या संततीवर उतारण्यात आली. आणि जे काही अल्लाहकडून ह.मूसा (अ.) आणि ह.ईसा (अ.) आणि दुसऱ्या पैगंबरांवर (अ.) दिले गेले; आम्ही त्यांच्यापैकी कोणाचा भेदभाव करीत नाही; आम्ही अल्लाहचे आज्ञाधारक आहोत[६] (१३६)**

فَإِنْ ءَامَنُوا۟ بِمِثْلِ مَآ ءَامَنتُم بِهِۦ فَقَدِ ٱهْتَدَوا۟ ۖ وَّإِن تَوَلَّوْا۟ فَإِنَّمَا هُمْ فِى شِقَاقٍ ۖ فَسَيَكْفِيكَهُمُ ٱللَّهُ ۚ وَهُوَ ٱلسَّمِيعُ ٱلْعَلِيمُ ﴿١٣٧﴾

**ते जर तुमच्या सारखे ईमान आणतील; तर हिदायत (मार्गदर्शन) प्राप्त करतील; आणि जर तोंड फिरवतील, तर विरोधात आहेत; लवकरच अल्लाहतआला यांचेकडून आपणास पुरेसा[७] होईन आणि तो खूप ऐकणारा, जाणणारा आहे. (१३७)**

صِبْغَةَ ٱللَّهِ ۖ وَمَنْ أَحْسَنُ مِنَ ٱللَّهِ صِبْغَةً ۖ وَنَحْنُ لَهُۥ عَٰبِدُونَ ﴿١٣٨﴾

**अल्लाहतआलाचा रंग धारण करा; आणि अल्लाहतआलापेक्षा कोणाचा रंग चांगला असेल[८]? आम्ही तर त्याचीच उपासना करणार आहोत (१३८)**

१) हे श्रेष्ठत्व आणि मोठेपण, त्यांना यासाठी प्राप्त झाले की, त्यांनी मानण्याचा आणि आज्ञाधारकपणाचा,ज्याची कोणाशी तुलना करता येऊ शकत नाही; असा नमुना त्यांनी पेश केला.

२) ह.इब्राहीम عليه السلام आणि ह.याकूब عليه السلام नी ''अद्दिन'' ची वसिअत आपल्या संततीला पण केली; जी यहूदीयत नाही; इस्लामच आहे; जसे या ठिकाणी पण याचा खुलासा आला आहे. आणि कुरआन करीममध्ये दुसऱ्या वेगवेगळ्या ठिकाणी पण याचा तपशील येईल. जसे ''अल्लाहजवळ दीन इस्लामच आहे'' (सू. आलेइमरान - १९)

३) यहूद्यांना, दाटदपट करण्यात येत आहे; तुम्ही जो हा दावा करतात की, ह.इब्राहीम عليه السلام व ह.याकूब عليه السلام नी आपल्या संततीला यहूदियतवर कायम राहण्याची वसिअत केली होती. तर काय, तुम्ही वसिअतच्या वेळी तेथे उपस्थित होते? जर ते सांगतील की, आम्ही उपस्थित होतो; तर त्यांचे हे खोटार्डेपण व निव्वळ आळ घेणे आहे. आणि जर सांगितले की, आम्ही उपस्थित नव्हतो; तर त्यांचा वर उल्लेखित दावा खोटा सिद्ध झाला; कारण त्यांनी जी

वसिअत केली, ती तर इस्लामची होती, यहुदियतची नव्हती. किंवा ईसाईयतची किंवा वसनीयत (मूर्तीपुजा) ची नव्हती. सर्व पैगंबरांचा धर्म इस्लामच होता. जरी धर्मशास्त्रांत व आचरणात काही मतभेद राहिला आहे. यालाच नबी ﷺ नी या शब्दांत वर्णन केले आहे; ''पैगंबरांचा समूह (अवलादे अल्लात) त्यांच्या आई वेगवेगळ्या आहे; आणि त्यांचा धर्म एकच आहे.'' (सहीह बुखारी)

४) हे पण यहूद्यांना सांगण्यात येत आहे की, तुमच्या वाडवडीलांतून जे पैगंबर व पुण्यवान लोक होऊन गेले आहेत; त्यांच्याकडे संबंधीत असण्याचा काही फायदा नाही. त्यांनी जे काही केले आहे त्याचा मोबदला त्यांना मिळेल; तुम्हाला नाही. तुम्हाला तेच मिळेल जे तुम्ही कमवाल. यामुळे माहित झाले की, आपल्या पूर्वजांच्या पुण्यांवर अवलंबून राहून, त्याचा सहारा घेणे चूक आहे. खरी गोष्ट, ईमान आणि सत्कृत्ये हिच आहेत. जो मागील पुण्यवानांचे पण भांडवल होते. आणि कयामतपर्यंत येणाऱ्या सर्व मानवांचा पण मुक्तीचे एकुलते एक साधन आहे.

५) यहूदी, मुसलमानांना यहूदियतचे व ईसाई, ईसाईयतचे आमंत्रण देत असत; आणि म्हणत की, मार्गदर्शन यांतच आहे. अल्लाहतआलाने म्हटले, यांना सांगा, मार्गदर्शन इब्राहीम عليه السلام च्या समूहाच्या अनुकरणांत आहे. जो ''हनीफ'' होता, (म्हणजे, एकुलत्या एक अल्लाहचा पुरस्कर्ता, आणि त्याचीच उपासना करणारा) आणि तो बहुदेववादी नव्हता. आणि यहूदियत व ईसाईयत दोघांमध्ये शिर्कची सरमिसळ अस्तित्वात आहे. आणि आता दुर्दैवाने मुसलमानांमध्ये सुद्धा शिर्कचे प्रकटीकरण सर्वसाधारण झाले आहे. इस्लामचे शिक्षण अल्लाहच्या कृपेने कुरआन व हदीसमध्ये सुरक्षित आहे; ज्यांच्यात एकेश्वरवादाची कल्पना बिल्कुल, बेगुबार, धूळ विहीत म्हणजे स्वच्छ आणि फारच स्पष्ट आहे. ज्यामुळे यहूदियत, इसाईयत आणि सनवीयत (दोन अल्लाहला मानणारे धर्म) पासून इस्लामचा निराळेपणा ठळकपणे दिसतो. परंतु, मुसलमानांतील एक फारच मोठ्या संख्येचे कर्म आणि श्रद्धा, आणि कल्पना बहुदेववादी विचारांचे आहेत,की त्यांनी इस्लामच्या वैशिष्ट्याला (पुस्तकाला) जगांच्या समोर अस्पष्ट करून दिले आहे; कारण की दुसऱ्या धर्मवाल्या लोकांची पोहोच खरे पाहता कुरआन व हदीसपर्यंत तर होऊ शकत नाही. ते मुसलमानांच्या कर्मांना बघूनच अंदाज करतील की, इस्लाममध्ये आणि दुसऱ्या ज्यांत बहुदेववादी कल्पनांचा समावेश अशा धर्मामध्ये तर काही निराळेपणा तर दिसत नाही. पुढील महावाक्यांत ईमानची कसोटी दर्शविण्यात येत आहे.

६) म्हणजे ईमान हे आहे की, सर्व पैगंबरां عليهم السلام ना अल्लाहतआलाकडून जे काही मिळाले किंवा त्यांच्यावर अवतरीत झाले, त्या सर्वांवर ईमान आणले जावे; कुठल्याही पुस्तकाला किंवा पैगंबराला नाकारले जाऊं नये. कुण्या एका पुस्तकाला वा एखाद्या पैगंबराला मानणे; आणि कोणाला न मानणे; हा पैगंबरांमध्ये भेदाभेद करणे आहे. ज्याला इस्लामने अयोग्य ठरविले आहे. तथापि आता, अमल (कर्म) फक्त, कुरआनकरीमच्याच आदेशावर होईल. मागच्या पुस्तकांत लिहिलेल्या गोष्टीवर होणार नाही; कारण एक तर ती मूळ अवस्थेत राहिली नाहीत. हेरफेर झालेली आहेत; दुसरे असे की, कुरआनाने या सर्वांना रद्दबातल करून टाकले आहे.

७) सहाबा कराम رضي الله عنهم नी सुद्धा उल्लेख केलेल्या पद्धतीवर ईमान आणले होते; म्हणून सहाबा رضي الله عنهم चे उदाहरण देऊन सांगण्यांत येत आहे की, जर तेही याच पद्धतीने ईमान आणतील, ज्याप्रकारे हे सहाबांनो ! رضي الله عنهم तुम्ही ईमान आणले आहे, तर ते खचितच मार्गदर्शन प्राप्त होऊन जातील. परंतु जर ते हटधर्मी आणि विरोधात विन्मुख झालेत; तर घाबरावयाचे काही (एक) कारण नाही. त्यांची कटकारस्थाने तुमचे काहीही बिघडवू शकत नाही. कारण की, अल्लाहतआला तुमचे सहाय्य करणारा आहे. लवकरच हा वायदा थोड्या वर्षांत पूर्ण झाला. आणि बनुकैनकाअ, आणि बनुनजीर ला हद्दपार करण्यात आले; आणि बनु कुरैज़ाला ठार मारण्यात आले. ऐतिहासिक उल्लेखामध्ये आहे की, ह.उस्मान رضي الله عنه च्या हौतात्म्याच्यावेळी त्यांनी लिहिलेली कुर्‌आनाची एक प्रत त्यांच्या कुशीत होती; या महावाक्यात ''फसायकफीकहुमुल्लाह'' या भागावर, त्यांच्या रक्ताचे शिंतोडे उडाले किंबहुना धार सुद्धा, ही कुर्‌आनाची प्रत आज सुद्धा, तुर्कस्थानात अस्तित्वात आहे.

८) ख्रिस्ती लोकांनी एक पिवळ्या रंगाचे पाणी खास करून ठेवले आहे. ते प्रत्येक ख्रिस्ती बालकाला आणि ज्याला ख्रिस्ती बनवायचे त्याला पाजण्यांत येते; या विधीला त्यांच्या येथे ''बाप्तीस्मा'' असे नांव आहे. हे त्यांच्याजवळ अत्यंत जरूरी आहे; आणि याच्याशिवाय ते कोणालाही पवित्र समजत नाही. अल्लाहतआलाने याचे खंडन केले आणि सांगितले की ''खरा रंग तर अल्लाहतआलाचा रंग आहे. याच्यापेक्षा दुसरा बेहतर रंग नाही; आणि अल्लाहच्या रंगाने अभिप्रेत नैसर्गिक धर्म म्हणजे इस्लाम धर्म आहे. ज्याच्याकडे प्रत्येक पैगंबराने आपापल्या काळी आपल्या समूहाला आवाहन केले, म्हणजे एकेश्वरवादाचे आवाहन!

قُلْ اَتُحَآجُّوْنَنَا فِى اللّٰهِ وَ هُوَ رَبُّنَا وَ رَبُّكُمْ ۚ وَلَنَاۤ اَعْمَالُنَا وَلَكُمْ اَعْمَالُكُمْ ۚ وَنَحْنُ لَهٗ مُخْلِصُوْنَ ﴿۱۳۹﴾

**आपण सांगून टाका की, काय तुम्ही अल्लाह्च्या बाबतीत झगडा करतात; जो आमचा आणि तुमचा पालनकर्ता आहे. आमच्यासाठी आमचे कर्म व तुमच्यासाठी तुमची कर्मे; आम्हीतर फक्त त्याच्याचसाठी निखालस आहोत[१]. ﴿१३९﴾**

اَمْ تَقُوْلُوْنَ اِنَّ اِبْرٰهٖمَ وَ اِسْمٰعِيْلَ وَ اِسْحٰقَ وَ يَعْقُوْبَ وَ الْاَسْبَاطَ كَانُوْا هُوْدًا اَوْ نَصٰرٰى ؕ قُلْ ءَاَنْتُمْ اَعْلَمُ اَمِ اللّٰهُ ؕ وَ مَنْ اَظْلَمُ مِمَّنْ كَتَمَ شَهَادَةً عِنْدَهٗ مِنَ اللّٰهِ ؕ وَمَا اللّٰهُ بِغَافِلٍ عَمَّا تَعْمَلُوْنَ ﴿۱۴۰﴾

**काय तुम्ही असे म्हणतात की, ह.इब्राहीम (अ.), ह.इस्माईल (अ.) आणि ह.इस्हाक (अ.) आणि ह.याकूब (अ.) आणि त्यांची संतती यहूदी किंवा खिस्ती होते. सांगून टाका, काय तुम्ही जास्त जाणता, का अल्लाहतआला[२]? अल्लाहतआलाजवळ ग्वाही लपवणाऱ्यांपेक्षा जास्त जालीम आणखी कोण आहे? आणि अल्लाह तुमच्या कर्मापासून अनभिज्ञ नाही[३] ﴿१४०﴾**

تِلْكَ اُمَّةٌ قَدْ خَلَتْ ۚ لَهَا مَا كَسَبَتْ وَلَكُمْ مَّا كَسَبْتُمْ ۚ وَلَا تُسْـَٔلُوْنَ عَمَّا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿۱۴۱﴾

**हा एक समुदाय आहे; जो होऊन गेला जे त्यांनी केले ते त्यांच्यासाठी आहे; आणि जे तुम्ही केले ते तुमच्यासाठी (आहे.) तुम्हाला त्यांच्या कर्माबद्दल[४] विचारले जाणार नाही ﴿१४१﴾**

१) काय तुम्ही आमच्याशी याचसाठी भांडण करीत आहात की, आम्ही एक अल्लाहची उपासना करीत आहोत ? आणि त्याच्याचसाठी निखालस आणि आज्ञापालनाची भावना ठेवतो. आणि त्याच्या हुकूमाचा आदर करतो आणि ज्यापासून मना करण्यात आले, त्यापासून वाचतो. वास्तविक पाहता; तो फक्त आमचाच पालनकर्ता नाही; तर तुमचाही पालनकर्ता आहे. आणि तुम्हालाही त्याचे बरोबर तसाच व्यवहार केला पाहिजे; जो आम्ही त्याच्याबरोबर करतो. आणि जर तुम्ही असे करीत नाहीत; तर तुमचे कर्म तुमच्याबरोबर आणि आमचे कर्म आमच्याबरोबर. आम्ही तर केवळ त्याच्याचसाठी कर्म करण्याची व्यवस्था करणार आहोत.

२) तुम्ही म्हणतात की, हे पैगंबर आणि त्यांची संतती यहूदी किंवा खिस्ती होती. जेंव्हा की, अल्लाहतआला याला अमान्य करतो. आता तुम्हीच सांगा की, जास्त ज्ञान तुम्हाला आहे की अल्लाहला?

३) तुम्हास ठाऊक आहे की, पैगंबर عليهم السلام लोक यहूदी किंवा खिस्ती नव्हते; याचप्रमाणे तुमच्या पुस्तकांमध्ये हुजूर ﷺ च्या निशाण्या पण उपस्थित आहेत; परंतु तुम्ही या ग्वाहींना लोकांपासून लपवून एका मोठ्या पापाचे धनी होत आहांत; जे अल्लाहपासून गुप्त नाही.

४) या महावाक्यांत पुन्हा कर्मा (प्रयत्नांची पराकाष्टा) चे महत्त्वपूर्ण वर्णन केल्यानंतर, बुजुर्गाबरोबर संबंध किंवा त्यांच्यावर भरोसा करण्याला निष्फळ ठरविण्यांत आले आहे. कारण की, ''ज्याला त्याच्या कर्माने पिछाडीला टाकले आहे; त्याला त्याचा वंश पुढे घेऊन जाणार नाही.'' (अबुदाऊद-३६४३ इब्ने माजा-२२५ सही मुस्लिम) याचा अर्थ असा की पूर्वींच्या पुण्यवान लोकांच्या पुण्याने तुम्हाला काही फायदा आणि त्यांच्या पापांबद्दल तुम्हाला काही विचारणा होणार नाही. किंबहुना त्यांच्या कर्माबद्दल तुम्हाला किंवा तुमच्या कर्माबद्दल त्यांना विचारले जाणार नाही. ''कोणी कोणाचे ओझे उचलणार नाही.'' (सू. फातिर - १८) ''मनुष्यासाठी तेच आहे; ज्याच्यासाठी त्याने प्रयत्न केला असेल''. (सू. अन्नजम-३९)

سَيَقُولُ السُّفَهَآءُ مِنَ النَّاسِ مَا وَلّٰىهُمْ عَنْ
قِبْلَتِهِمُ الَّتِىْ كَانُوْا عَلَيْهَا ؕ قُلْ لِّلّٰهِ الْمَشْرِقُ
وَالْمَغْرِبُ ؕ يَهْدِىْ مَنْ يَّشَآءُ اِلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿١٤٢﴾

**लवकरच नादान लोक म्हणतील, ज्या किबल्यावर हे होते त्यापासून यांना कोणत्या वस्तूने हटविले? आपण सांगून टाका की, पूर्व आणि पश्चिम अल्लाहतआलासाठीच आहे. तो[१] ज्याला इच्छिल त्याला सरळ मार्गाची सुबुध्दी देईल** (१४२)

وَكَذٰلِكَ جَعَلْنٰكُمْ اُمَّةً وَّسَطًا لِّتَكُوْنُوْا شُهَدَآءَ
عَلَى النَّاسِ وَيَكُوْنَ الرَّسُوْلُ عَلَيْكُمْ شَهِيْدًا ؕ وَمَا
جَعَلْنَا الْقِبْلَةَ الَّتِىْ كُنْتَ عَلَيْهَآ اِلَّا لِنَعْلَمَ مَنْ
يَّتَّبِعُ الرَّسُوْلَ مِمَّنْ يَّنْقَلِبُ عَلٰى عَقِبَيْهِ ؕ وَاِنْ
كَانَتْ لَكَبِيْرَةً اِلَّا عَلَى الَّذِيْنَ هَدَى اللّٰهُ ؕ وَمَا كَانَ اللّٰهُ
لِيُضِيْعَ اِيْمَانَكُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ بِالنَّاسِ لَرَءُوْفٌ رَّحِيْمٌ ﴿١٤٣﴾

**आम्ही तुम्हांस अशा प्रकारे (एक) न्यायप्रिय समूह बनवला आहे[२]; कारण की, तुम्ही लोकांवर साक्षी व्हावे; आणि रसूल (सल्ल.) नी तुमच्यावर साक्षी व्हावे. ज्या किबल्यावर पूर्वी तुम्ही होता, त्याला फक्त यासाठी आम्ही मुकर्रर केले होते (की), आम्ही जाणून घ्यावे की, रसूल (सल्ल.) चा खरा आज्ञाधारक कोण आहे? आणि कोण आहे जो आपल्या टाचांवर घुमजाव करतो[३]? जणू हे काम कठीण आहे; परंतु ज्यांना अल्लाहने सुबुद्धी (हिदायत) दिली आहे. (त्यांच्यावर अजिबात कठीण नाही) अल्लाहतआला तुमचे ईमान व्यर्थ घालवणार नाही.[४] अल्लाहतआला लोकांसाठी फारच ममता करणारा आणि दयाळू आहे** (१४३)

قَدْ نَرٰى تَقَلُّبَ وَجْهِكَ فِى السَّمَآءِ ۚ فَلَنُوَلِّيَنَّكَ
قِبْلَةً تَرْضٰىهَا ۪ فَوَلِّ وَجْهَكَ شَطْرَ الْمَسْجِدِ الْحَرَامِ ؕ
وَحَيْثُ مَا كُنْتُمْ فَوَلُّوْا وُجُوْهَكُمْ شَطْرَهٗ ؕ وَاِنَّ
الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ لَيَعْلَمُوْنَ اَنَّهُ الْحَقُّ مِنْ
رَّبِّهِمْ ؕ وَمَا اللّٰهُ بِغَافِلٍ عَمَّا يَعْمَلُوْنَ ﴿١٤٤﴾

**आम्ही आपल्या चेहऱ्याला वारंवार आकाशाकडे उठताना पहात आहोत. आता आम्ही आपणांस त्या किबल्याकडे फिरवून देऊ; ज्यामुळे आपण खूष होऊन जाल. आपण आपले मुख मस्जिदे हरामकडे फिरवून घ्या. आणि आपण जेथे कोठे असाल, आपले तोंड याचकडे फिरवून घेत जा. ग्रंथधारी लोकांना या गोष्टीचे अल्लाहतआलाकडून होण्याचे आधीच ज्ञान आहे[५]. आणि अल्लाहतआला त्या कर्मापासून अनभिज्ञ नाही, जे हे करीत असतात.** (१४४)

وَلَئِنْ اَتَيْتَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ بِكُلِّ اٰيَةٍ مَّا تَبِعُوْا
قِبْلَتَكَ ۚ وَمَآ اَنْتَ بِتَابِعٍ قِبْلَتَهُمْ ۚ وَمَا بَعْضُهُمْ بِتَابِعٍ
قِبْلَةَ بَعْضٍ ؕ وَلَئِنِ اتَّبَعْتَ اَهْوَآءَهُمْ مِّنْ بَعْدِ مَا جَآءَكَ
مِنَ الْعِلْمِ ۙ اِنَّكَ اِذًا لَّمِنَ الظّٰلِمِيْنَ ﴿١٤٥﴾

**आणि जरी आपण ग्रंथधारी लोकांना सर्व पुरावे देऊन द्याल, तरी ते तुमच्या किबल्याचे अनुकरण करणार नाही; आणि[६] तुम्ही सुद्धा त्यांच्या किबल्याला मानणार नाही आणि[७] हे आपसांत एक दुसऱ्याच्या किबल्याला मानणार नाही[८] आणि आपण याउपर सुद्धा की, आपल्याजवळ ज्ञान आले आहे, या लोकांच्या मनेच्छेच्या मागे लागाल; तर आपण सुद्धा खचितच जालिमांमधून होऊन जाल[९]** (१४५)

اَلَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ يَعْرِفُوْنَهٗ كَمَا يَعْرِفُوْنَ
اَبْنَآءَهُمْ ؕ وَاِنَّ فَرِيْقًا مِّنْهُمْ لَيَكْتُمُوْنَ الْحَقَّ
وَهُمْ يَعْلَمُوْنَ ﴿١٤٦﴾

**ज्यांना आम्ही पुस्तक दिले आहे, ते तर याला असे ओळखता जसे कोणी आपल्या मुलांना ओळखतात. याचा एक समूह सत्याला ओळखल्यानंतर त्याला लपविती[१०]** (१४६)

(१) जेव्हा हजरत मोहम्मद ﷺ मक्केहून हिजरत करून मदिनेला गेले. तेंव्हा १६,१७ महिने बैतुल मुकद्दसकडे तोंड करून नमाज पढत राहिले. वास्तविक पाहता आपली ﷺ इच्छा होती की, खाना ए काबाकडे तोंड करून नमाज पढली जावी. जो किबला-ए-इब्राहीमी आहे. याकरीता आपण ﷺ प्रार्थनापण करीत असत. आणि वारंवार आकाशाकडे दृष्टीपण टाकीत. शेवटी अल्लाहतआलाने किबला बदलाचा आदेश देऊन टाकला; ज्यावर यहूद्यांनी आणि दांभिकांनी खूप आक्षेप घेतला. वास्तविक नमाज अल्लाहची एक उपासना आहे. उपासकाला ज्याप्रमाणे आदेश होतो, त्याप्रमाणे तो करण्याला बांधील असतो. म्हणून जिकडे अल्लाहतआलाने तोंड फिरवायला सांगितले, तिकडे तोंड करणे जरूरीचे होते. याशिवाय ज्या अल्लाहची उपासना करावयाची आहे; पूर्व, पश्चिम आणि साऱ्या दिशा त्याच्याच आहे. यासाठी दिशेचे काही महत्त्व नाही. प्रत्येक दिशेत अल्लाहची उपासना होऊ शकते. या अटीवर की, त्या दिशेचा अंगीकार करण्याचा आदेश अल्लाहने दिला असावा. किबला बदलचा हा आदेश असरच्या नमाजीच्या वेळेस आला आणि असरची नमाज खाना-ए-काबाकडे तोंड करून पढली गेली.

(२) 'वसत्' चा शब्द कोषीय अर्थ तर 'मधला' आहे. परंतु हा शब्द उत्कृष्ट आणि श्रेष्ठ या अर्थाने सुद्धा वापरला जातो. या ठिकाणी याच अर्थाने याचा उपयोग करण्यात आला आहे. म्हणजे ज्याप्रमाणे तुम्हाला सर्वांत उत्कृष्ट असा किब्ला देण्यात आला आहे, त्याप्रमाणे तुम्हाला सर्वांत उत्कृष्ट समूह (उम्मत) पण बनविण्यात आला आहे. आणि याचा उद्देश असा की, तुम्ही लोकांवर साक्ष द्यावी, जसे दुसऱ्या ठिकाणी आहे. ''रसूल ﷺ तुमच्यावर आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार आहात'' (सू. अलहज्ज-७८) याचे स्पष्टीकरण काही हदीसीमध्ये असे येते की, जेव्हा अल्लाहतआला कयामतच्या दिवशी पैगंबरांना विचारील की, तुम्ही माझा संदेश लोकांपर्यंत पोहचवला होता? ते होकारार्थी उत्तर देतील. अल्लाहतआला विचारेल तुमचा कोणी साक्षीदार आहे? ते म्हणतील की हो आहे. मोहम्मद ﷺ व त्यांची 'उम्मत', त्यावर ही उम्मत साक्ष देईल. यासाठी याचे भाषांतर न्यायप्रिय (आदिल) पण केले गेले आहे. (इब्ने कसीर) ''वसत्'' चा एक अर्थ मध्यममार्गी (एतेदाल) पण केला गेला आहे. म्हणजे ही उम्मत मध्यममार्गी आहे. म्हणजे कोणत्याही मामल्यात मध्यममार्ग अवलंबतात. हे इस्लामी शिक्षणाच्या दृष्टीकोणाने आहे, की हा मध्यममार्ग आहे. अतिही नाही आणि कमीही नाही.

(३) येथे 'किब्ला' बदलाचा एक उद्देश वर्णन करण्यात आली आहे. ईमानवाले आणि सच्चेलोक रसूल ﷺ च्या एका इशाऱ्याची प्रतीक्षा करीत असत. यासाठी त्यांच्या इकडून तिकडे फिरण्यात त्यांना काही कठीण मामला नव्हता. किंबहुना एके ठिकाणी तर, नेमकी नमाजीची अवस्था होती, जेव्हा ते रूकूअ मध्ये होते, हा आदेश पोहचला तेव्हा त्यांनी आपला रूख रूकूअमध्येच खाना-ए-काबाकडे फिरवून घेतला. ही मशिद 'मस्जिद किबल्तैन' (म्हणजे ती मशिद जिच्यात एक नमाज दोन किबल्यांकडे रूख करून पढली गेली) म्हटली गेली. आणि असाच प्रसंग 'मस्जिदे कुबा' मध्ये पण घडला. 'लिनाअ्लमा' (कारण की, आम्ही जाणून घ्यावे) अल्लाहला तर पूर्वीच ज्ञान होते. याचा अर्थ आहे की, आम्ही भरोश्यावाल्यांना शंकाखोरीपासून वेगळे करून टाकावे. म्हणजे लोकांच्या समोरपण दोन्ही प्रकारचे लोक स्पष्ट होऊन जावेत. (फत्हुल कदीर)

(४) काही सहाबा ﵃ च्या मनात असा विचार आला की, जे सहाबा ﵃ बैतुल मुकद्दसकडे रूख करून नमाज पढण्याच्या काळात मृत्यू पावले; किंवा आम्ही जितक्या काळापर्यंत याच्याकडे रूख करून नमाज पढत राहिलो आहोत ही व्यर्थ गेली, किंवा याचे पुण्य आम्हास मिळणार नाही. अल्लाहतआलाने म्हटले, या नमाजी व्यर्थ जाणार नाही, तुम्हास पूर्ण पुण्य मिळेल. याठिकाणी नमाजला ईमान सारखे ठरवून, हे पण स्पष्ट करून देण्यात आले की, नमाजीशिवाय ईमानचा काहीही दर्जा (हैशियत) नाही. ईमान तेव्हाच भरोसेलायक (मुअतबर) आहे; जेव्हा, नमाज आणि अल्लाहच्या दुसऱ्या आदेशांची पाबंदी (अंमलबजावणी) केली जाईल.

(५) ग्रंथधारी लोकांच्या वेगवेगळ्या पुस्तकांत खाना-ए-काबा शेवटच्या पैगंबराचा किबला होण्याबद्दल स्पष्ट उल्लेख नमुद आहेत. यामुळे याचे सत्य होणे त्यांना खात्रीपूर्वक ठाऊक होते; परंतु त्यांचा वांशिक गर्व, द्वेष सत्य स्वीकारण्यात रूकावट बनला.

(६) कारण यहूद्यांचा विरोध तर द्वेष आणि वांशिक श्रेष्ठत्वावर आहे; म्हणून पुराव्यांचा त्यांच्यावर काहीही परिणाम होणार नाही. म्हणून असर (परिणाम) होण्यासाठी माणसाचे अंत:करण निर्मळ पाहिजे.

(७) कारण की आपण ﷺ अल्लाहच्या वह्यचे बंधक (पाबंद) आहांत. जोपर्यंत आपणाला अल्लाहकडून असा आदेश मिळणार नाही, आपण त्यांच्या किबल्याला कसे काय मान्य करणार ?

(८) यहूद्यांचा किबला सखरा-ए-बैतुल मुकद्दस आणि ख्रिस्त्यांचा बैतुल मुकद्दसची पूर्व बाजू आहे. जेव्हा ग्रंथधारी लोकांचे दोन समूहपण एका किबल्यावर नाही; तर ते मुसलमानांकडून कांअपेक्षा करतात, की त्यांनी आमचे अनुकरण करावे?

(९) ही तंबी पहिलेपण येऊन चुकली आहे. उद्देश उम्मतला सावध (आगाह) करून देणे आहे; की कुरआन हदीसचे ज्ञान असून सुद्धा बिदअत करणाऱ्यांच्यामागे लागणे, जुलूम आणि मार्गभ्रष्ट होणे आहे.

(१०) येथे ग्रंथधारी लोकांच्या एका गटाला सत्याला लपविणारा गुन्हेगार ठरविण्यात आले आहे. कारण की यांच्यात अब्दुल्लाह बिन सलाम सारख्यांचा एक गट पण होता, जो सत्य आणि अंत:करणाच्या निर्मळतेमुळे इस्लाममध्ये दाखल झाला.

اَلْحَقُّ مِنْ رَّبِّكَ فَلَا تَكُوْنَنَّ مِنَ الْمُمْتَرِيْنَ ﴿١٤٧﴾

**आपल्या पालनकर्त्यांकडून हे निव्वळ सत्य आहे. खबरदार! आपण शंका घेणाऱ्यांमध्ये न होऊन जावे[१] (१४७)**

وَلِكُلٍّ وِّجْهَةٌ هُوَ مُوَلِّيْهَا فَاسْتَبِقُوا الْخَيْرٰتِ ؕ اَيْنَ مَا تَكُوْنُوْا يَاْتِ بِكُمُ اللّٰهُ جَمِيْعًا ؕ اِنَّ اللّٰهَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿١٤٨﴾

**आणि प्रत्येक माणूस कोणा एकाकडे वळत आहे[२]. तुम्ही पुण्याकडे धावा. तुम्ही जेथे कोठे असाल अल्लाह तुम्हाला घेऊन येईल. अल्लाहतआला प्रत्येक वस्तुवर सर्व सामर्थ्यवान आहे (१४८)**

وَمِنْ حَيْثُ خَرَجْتَ فَوَلِّ وَجْهَكَ شَطْرَ الْمَسْجِدِ الْحَرَامِ ؕ وَاِنَّهٗ لَلْحَقُّ مِنْ رَّبِّكَ ؕ وَمَا اللّٰهُ بِغَافِلٍ عَمَّا تَعْمَلُوْنَ ﴿١٤٩﴾

**आणि आपण जेथून (पण) निघाल, आपले तोंड (नमाजीत) मस्जिदे हरामकडे करीत जा, आणि निःसंशय हेच सत्य आहे आपल्या पालनकर्त्याकडून आणि जे काही तुम्ही करीत आहात; त्यापासून अल्लाहतआला अनभिज्ञ नाही (१४९)**

وَمِنْ حَيْثُ خَرَجْتَ فَوَلِّ وَجْهَكَ شَطْرَ الْمَسْجِدِ الْحَرَامِ ؕ وَحَيْثُ مَا كُنْتُمْ فَوَلُّوْا وُجُوْهَكُمْ شَطْرَهٗ ۙ لِئَلَّا يَكُوْنَ لِلنَّاسِ عَلَيْكُمْ حُجَّةٌ ۗ اِلَّا الَّذِيْنَ ظَلَمُوْا مِنْهُمْ ۚ فَلَا تَخْشَوْهُمْ وَاخْشَوْنِيْ ۚ وَلِاُتِمَّ نِعْمَتِيْ عَلَيْكُمْ وَلَعَلَّكُمْ تَهْتَدُوْنَ ﴿١٥٠﴾

**आणि ज्या ठिकाणापासून आपण निघतात, आपले तोंड मस्जिदे हरामकडे फिरवून घ्या; आणि जेथे कोठे आपण असाल आपले चेहरे याच्याचकडे करत[३] जा; कारण की लोकांची कुठलीही हुज्जत आपणावर बाकी राहू नये. त्या लोकांशिवाय[४] ज्यांनी त्यांच्यातून[५] जुलूम केला आहे, आपण त्यांना भिऊ नका[६]. मलाच भ्या. म्हणजे मी माझ्या देणग्या तुमच्यावर पूर्ण करीन; आणि याच्यासाठी की, तुम्ही सरळ मार्ग पावाल (१५०)**

(१) पैगंबरावर अल्लाहकडून जोपण आदेश उतरतो, तो खचितच सत्य असतो. त्यांच्यात शंका कुशंकेला काहीही वाव नाही.

(२) म्हणजे प्रत्येक धर्मवाल्याने आपला आवडता किबला बनवून ठेवला आहे; ज्याकडे तो आपला रूख करतो. दुसरा विषय हा आहे की, प्रत्येक धर्मवाल्याने आपले एक शास्त्र व संप्रदाय ठरवून ठेवले आहे. जसे की कुरआन करीममध्ये सू. माइद: महावाक्य - ४८ मध्ये केले आहे; म्हणजे अल्लाहतआलाने मार्गदर्शन व आडमार्गी भटकणे दोघांच्या स्पष्टीकरणानंतर मानवाला या दोघांपैकी कोणालाही अंगिकारण्याचे जे स्वातंत्र्य दिले आहे; त्यामुळे लोकांनी निरनिराळ्या पद्धती अंगिकारल्या आहेत. ज्या एक दुसऱ्यांपासून वेगवेगळ्या आहेत. अल्लाहतआला इच्छिता तर, सर्वांना एकाच मार्गावर म्हणजे हिदायतच्या मार्गावर चालवू शकला असता. परंतु हे अधिकारांच्या काढून घेतल्याशिवाय शक्य नव्हते. आणि अधिकार देण्याचा उद्देश त्याची परीक्षा घेणे आहे. म्हणून हे मुसलमानांनो ! तुम्ही पुण्याच्या कामाकडे अग्रेसर रहा म्हणजे नेकी आणि भलाईच्या रस्त्यावर चालत रहा. आणि हा, अल्लाहचे वह्य, आणि रसूल ﷺ च्या आज्ञापालनाचा रस्ता आहे; ज्याच्यापासून दुसरे धर्मवाले वंचित आहेत.

(३) किबल्याकडे तोंड फिरविण्याचा हुकूम तीन वेळा सांगण्यात आला आहे. हे यासाठी की, याची ताकीद आणि महत्त्व स्पष्ट करण्यासाठी किंवा हा हुकूम रद्द करण्याचा पहिला अनुभव होता म्हणून बौद्धीक घोटाळा दूर करण्यासाठी तीन वेळा सांगणे जरूरी होते; की, त्याला वारंवार सांगून, मनावर पक्के बिंबवले जावे किंवा कित्येक कारणाने (तअुद्दद्दे अिल्लत) असे केले गेले. एक कारण नबी ﷺ ची मर्जी आणि इच्छा होती. तेथे याला वर्णन करण्यात आले. दुसरे कारण प्रत्येक समूहासाठी आणि प्रत्येक आवाहन करणाऱ्यासाठी एक कायम स्वरूपी केंद्राचे अस्तित्व आहे. तेथे याला वारंवार सांगण्यात आले. तिसरे कारण विरोधकांच्या आक्षेपांचे निरसन करणे आहे. तेथे याचे वर्णन करण्यात आले (फतहुल कदीर)

(४) म्हणजे ग्रंथधारी लोकांनी हे म्हणू शकू नये की, आमच्या पुस्तकात तर याचा किबला खाना-ए-काबा आहे; आणि नमाज हे बैतुल मुकद्दसकडे तोंड करून पढतात.

(५) येथे 'ज़लमु' ने अभिप्रेत 'मुआनिदीन' (शत्रुत्व ठेवणारे) आहे. म्हणजे ग्रंथधारी लोकांमधून जे वांशिक श्रेष्ठत्व मानणारे होते, ते हे जाणून सुद्धा की, शेवटच्या काळांतील पैगंबराचा ﷺ किबला खाना-ए-काबाच राहील; ते वांशिक श्रेष्ठत्वाच्या दृष्टीने म्हणतील की, बैतुल मुकद्दसच्या ऐवजी खाना-ए-काबाला आपला किबला बनवून ह्या पैगंबराने ﷺ शेवटी आपल्या वाडवडीलांच्या धर्माकडेच वळला आहे. आणि काहींच्या जवळ याच्याने अभिप्रेत मक्केचे बहुदेववादी आहेत.

(६) जालिमांना भिऊ नका, म्हणजे बहुदेववाद्यांच्या गोष्टीची पर्वा करू नका. त्यांनी सांगितले होते की, मोहम्मद ﷺ नी आमचा किबला तर स्वीकारला आहेच; लवकरच आमचा धर्मपण स्वीकारून घेतील. 'मलाच भित रहा' जी आज्ञा मी देत राहीन; तिच्यावर (कुठल्याही निंदकाच्या निंदेची पर्वा न करता) भीतीशिवाय अंमलबजावणी करीत रहा. किबल्याच्या बदलाला, देणगीच्या पूर्ण करण्याने आणि मार्गदर्शन प्राप्तीसाठी, ठरविण्यात आले की, अल्लाहच्या हुकुमावर अंमलबजावणी करणे खचितच मानवाला, बक्षिशी आणि प्रतिष्ठेचा हकदार बनवून देते आणि हिदायतची सुबुद्धीपण त्याला प्राप्त होते.

كَمَآ اَرۡسَلۡنَا فِيۡكُمۡ رَسُوۡلًا مِّنۡكُمۡ يَتۡلُوۡا عَلَيۡكُمۡ اٰيٰتِنَا وَيُزَكِّيۡكُمۡ وَ يُعَلِّمُكُمُ الۡكِتٰبَ وَالۡحِكۡمَةَ وَ يُعَلِّمُكُمۡ مَّا لَمۡ تَكُوۡنُوۡا تَعۡلَمُوۡنَ ﴿١٥١﴾

**ज्याप्रमाणे[१] आम्ही तुमच्यातूनच रसूल पाठविला; जो आमची महावाक्ये तुमच्यासमोर वाचून दाखवितो; आणि तुम्हाला पवित्र करतो. आणि तुम्हाला पुस्तक व ज्ञान आणि त्या गोष्टी शिकवतो; ज्याकडून तुम्ही अनभिज्ञ होता** (१५१)

فَاذۡكُرُوۡنِىۡٓ اَذۡكُرۡكُمۡ وَاشۡكُرُوۡا لِىۡ وَلَا تَكۡفُرُوۡنِ ﴿١٥٢﴾

**या करीता तुम्ही माझे स्मरण करा. मी पण तुमची आठवण ठेवीन. माझे आभार प्रदर्शन करा. कृतघ्नता करण्यापासून वाचा[२]** (१५२)

يٰٓاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوا اسۡتَعِيۡنُوۡا بِالصَّبۡرِ وَالصَّلٰوةِ ‌ؕ اِنَّ اللّٰهَ مَعَ الصّٰبِرِيۡنَ ﴿١٥٣﴾

**हे ईमानवाल्यांनो! धैर्यशिलता आणि नमाजद्वारे मदत मागा; नि:संशय अल्लाहतआला सहनशिल लोकांबरोबर आहे[३]** (१५३)

وَلَا تَقُوۡلُوۡا لِمَنۡ يُّقۡتَلُ فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ اَمۡوَاتٌ ؕ بَلۡ اَحۡيَآءٌ وَّلٰكِنۡ لَّا تَشۡعُرُوۡنَ ﴿١٥٤﴾

**आणि अल्लाहतआलाच्या मार्गातील हुतात्म्यांना मृत म्हणू नका[४]; ते जिवंत आहेत, परंतु तुम्ही जाणत नाही** (१५४)

وَلَنَبۡلُوَنَّكُمۡ بِشَىۡءٍ مِّنَ الۡخَـوۡفِ وَالۡجُـوۡعِ وَنَقۡصٍ مِّنَ الۡاَمۡوَالِ وَالۡاَنۡفُسِ وَالثَّمَرٰتِ ‌ؕ وَبَشِّرِ الصّٰبِرِيۡنَ ﴿١٥٥﴾

**आणि आम्ही कुठल्याना कुठल्या प्रकारे तुमची कसोटी जरूर घेऊ. शत्रुच्या भीतीने, भूक आणि तहानेने, माल व प्राण आणि फळांच्या कमतरतेने आणि सहनशिल लोकांना खुषखबरी सांगून द्या** (१५५)

الَّذِيۡنَ اِذَآ اَصَابَتۡهُمۡ مُّصِيۡبَةٌ ۙ قَالُوۡٓا اِنَّا لِلّٰهِ وَاِنَّـآ اِلَيۡهِ رٰجِعُوۡنَ ﴿١٥٦﴾

**त्यांना जेव्हा संकट येते तर ते म्हणतात, आम्ही तर अल्लाहचेच आहोत; आणि त्याच्याचकडे परतून जाणार आहोत.** (१५६)

(१) म्हणजे देणग्यांची प्राप्ती आणि हिदायतची सुबुद्धी तुम्हाला अशा प्रकारे मिळाली, जसे याच्यापूर्वी तुमच्यांत तुमच्यातूनच एक रसूल पाठविला; जो तुमची चित्तशुद्धी करतो. आणि तुम्हाला पुस्तक आणि ज्ञानाचे शिक्षण देतो. आणि ज्याचे तुम्हाला काही ज्ञान नव्हते, ते शिकवतो.

(२) बस् या देणग्यावर तुम्ही माझे स्मरण करा; आणि आभार माना. देणग्याप्रति कृत्घ्नता दाखवू नका. स्मरणचा अर्थ नेहमी अल्लाहतआलाला याद ठेवणे आहे. म्हणजे त्याची तस्बीह (सुबहान्नल्लाह म्हणणे) तहलील (लाइलाहा इल्लल्लाह म्हणणे) आणि तक्बीर (अल्लाहो अकबर म्हणणे) करा. आणि आभार मानण्याचा अर्थ असा आहे की, त्याने दिलेल्या शक्ती आणि सामर्थ्याचा उपयोग त्याच्या आज्ञापालनांत करणे आहे. अल्लाहकडून मिळालेल्या शक्तीला, अल्लाहच्या आज्ञाभंजनात उपयोगांत आणणे, ही अल्लाहशी कृत्घ्नता आणि त्याच्या देणग्यास नाकारणे आहे. आभार मानल्यामुळे आणखी जास्त उपकारांची खुषखबर आणि कृतघ्नता दाखविल्यावर कडक प्रकोपाची धमकी आहे. ''जर तुम्ही कृतज्ञ रहाल, तर निश्चितच मी अधिक देईन आणि जर तुम्ही कृतघ्न होउन जाल तर माझी शिक्षा फार कडक आहे.'' (सू. इब्राहीम – ७)

(३) मनुष्याच्या दोनच अवस्था असतात. आराम व राहत (सुखसमृद्धी व मन:शांती) किंवा त्रास आणि परेशानी. देणग्यांमध्ये अल्लाहचे आभार माणण्याची तालीम आणि त्रासांमध्ये सहनशिलता आणि पश्चात्ताप व्यक्त करण्याची ताकीद आहे. हदीसमध्ये आहे; ''मोमिनची अवस्था पण विचित्र आहे. त्याला खुशी होते तर तो अल्लाहचे आभार मानतो. आणि त्रास होतो तेव्हा सहनशिलता पत्करतो. दोन्ही अवस्था त्याच्यासाठी भलाईच्या आहेत. (सहीह मुस्लिम हदीस क्र. २९९९) सहनशिलतेचे दोन प्रकार आहेत. एक, निषिध्द व पापकर्माला सोडून देणे, त्याच्यापासून स्वत:ला वाचविणे, त्यापासून मिळणाऱ्या लज्जतीचा त्याग व तात्कालीक फायद्याचे नुकसान यावर सहनशिलता पत्करणे. दुसरा, अल्लाहच्या आदेशांचे पालन करतांना ज्या अडचणी आणि त्रास होईल, त्यांना सहनशिलतेने व मनाला आवर घालून सहन करणे. काही लोकांनी सहनशिलतेची व्याख्या अशी केली आहे की, अल्लाहच्या आवडत्या गोष्टींची अंमलबजावणी करणे, मग ती जिवाला आणि शरीराला किती का भारी वाटेना! आणि अल्लाहच्या नावडत्या गोष्टींपासून स्वत:ला वाचविले पाहिजे; मनेच्छा आणि यापासून मिळणारा आनंद, त्याला या गोष्टींकडे कितीही आकर्षित करेना! (इब्ने कसीर)

(४) हुतात्म्यांना मृत न म्हणणे, त्यांच्या गौरव व सन्मानार्थ आहे. हे जीवन बर्जखचे जीवन आहे. ज्याला आम्ही जाणून घेण्यास असमर्थ आहोत. हुतात्म्यांचा आत्मा, आणि एका उल्लेखानुसार मोमिनचा आत्मापण एका पक्ष्याच्या रूपांत स्वर्गात जेथे इच्छेल तेथे फिरत असतो. (इब्ने कसीर आणि पहा सू.आले इमरान – १६९)

أُولَٰئِكَ عَلَيْهِمْ صَلَوَاتٌ مِّن رَّبِّهِمْ وَرَحْمَةٌ ۖ وَأُولَٰئِكَ هُمُ الْمُهْتَدُونَ ﴿١٥٧﴾

**यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याकडून मेहरनजर व दया आहे. आणि हेच लोक सरळ मार्गावर आहेत[१] ﴿१५७﴾**

إِنَّ الصَّفَا وَالْمَرْوَةَ مِن شَعَائِرِ اللَّهِ ۖ فَمَنْ حَجَّ الْبَيْتَ أَوِ اعْتَمَرَ فَلَا جُنَاحَ عَلَيْهِ أَن يَطَّوَّفَ بِهِمَا ۚ وَمَن تَطَوَّعَ خَيْرًا فَإِنَّ اللَّهَ شَاكِرٌ عَلِيمٌ ﴿١٥٨﴾

**नि:संशय! सफा आणि मर्वह अल्लाहच्या निशाण्यांमधून आहेत[२].म्हणून खाना-ए-काबाचा हज व उमरा करतेवेळी त्यांचा तवाफ करण्यात कोणताही गुन्हा नाही[३]. आपल्या खुशीने पुण्य करणाऱ्या लोकांचा अल्लाह गुणग्राहक आहे; आणि तो त्यांना खूप ओळखणारा आहे ﴿१५८﴾**

إِنَّ الَّذِينَ يَكْتُمُونَ مَا أَنزَلْنَا مِنَ الْبَيِّنَاتِ وَالْهُدَىٰ مِن بَعْدِ مَا بَيَّنَّاهُ لِلنَّاسِ فِي الْكِتَابِ ۙ أُولَٰئِكَ يَلْعَنُهُمُ اللَّهُ وَيَلْعَنُهُمُ اللَّاعِنُونَ ﴿١٥٩﴾

**जे लोक आमच्या उतारलेल्या निशाण्या आणि उपदेश (हिदायत) लपवितात असे असतांना सुद्धा की, आम्ही त्यांना आपल्या पुस्तकांत लोकांसाठी वर्णन करून चुकलो आहोत. या लोकांवर अल्लाहचा आणि सर्व धिक्कार करणाऱ्यांचा धिक्कार[४] आहे. ﴿१५९﴾**

إِلَّا الَّذِينَ تَابُوا وَأَصْلَحُوا وَبَيَّنُوا فَأُولَٰئِكَ أَتُوبُ عَلَيْهِمْ ۚ وَأَنَا التَّوَّابُ الرَّحِيمُ ﴿١٦٠﴾

**परंतु ते लोक जे तौबा करतील; व स्वत:ला सुधारतील आणि लोकांना (लपविलेल्या) गोष्टी सांगून टाकतील; तर अशा लोकांची तौबा मी कबूल करतो. आणि मी तौबा (पश्चात्ताप) कबूल करणारा कृपा व दया करणारा आहे. ﴿१६०﴾**

(१) या महावाक्यात सहनशिलता पत्करणाऱ्यांसाठी आनंदाच्या बातम्या आहेत. हदीसमध्ये येते की, जेव्हा नुकसान झाले असता, ''इन्नालिल्लाहे व इन्ना इलैहे राजेऊन'' बरोबर ''अल्लाहुम्मा अजुर्नी फी मुसीबती व अखलिफ् ली, खैरम मिनहा'' म्हणण्याचे महत्त्व व ताकीद आलेली आहे. (स.मुस्लीम हदीस क्र.९१८)

(२) 'शआईर' शओरतुनचे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ निशाण्या आहे. या ठिकाणी हजची कामे उदा.वकूफ, सओ, मनहर, हदी वगैरेंना निशाण्या म्हटले आहे; जे अल्लाहतआलाने निश्चित करून दिले आहेत.

(३) सफा व मर्वहच्या दरम्यान 'सओ' (परीक्रमा) करणे हा हजचा एक भाग आहे. परंतु कुरआनाच्या शब्दामुळे की, ''यात कोणताही गुन्हा नाही.'' काही सहाबा ﷺ ना ही शंका आली; की सओ करणे कदाचित् आवश्यक नाही. ह.आयेशा ﷺ यांना जेव्हा हे माहित झाले, तेव्हा त्या म्हणाल्या, जर याचा हा अर्थ असता तर अल्लाहतआलाने असे म्हटले असते की, त्यांच्या दरम्यान सओ (परिक्रमा) केली नाही, तर कोणताही गुन्हा नाही. मग त्यांनी या महावाक्यांचे अवतरीत होण्याचे कारण सांगितले की, अन्सार (मदिनेचे रहिवासी) इस्लाम धर्मात येण्यापूर्वी ('मनांत तागीया') मूर्तींच्या नावाचा जयघोष करीत; ज्याची पुजा ते 'मुशल्लल' नांवाच्या डोंगरावर करीत असत. आणि मक्केला पोहचल्यावर हे लोक सफा-मर्वहच्या सओला गुन्हा समजत होते. मुसलमान झाल्यानंतर त्यांनी रसूल ﷺ ना याबाबतीत विचारले तेव्हा हे महावाक्य अवतरीत झाले की, सफा व मर्वह दरम्यान सओ करणे, गुनाह नाही. काही उलेमांनी याची पार्श्वभूमी अशाप्रकारे सांगितली आहे की, अज्ञान काळात मूर्तीपुजकांची सफा डोंगरावर एक मूर्ती 'इसाक' ची आणि 'मर्वह' डोंगरावर एक मूर्ती 'नाईला' देवीची ठेवली होती. ज्यांना ते सओ करतेवेळी स्पर्श करीत, किंवा त्यांचे चुंबन घेत. जेव्हा लोक मुसलमान झाले, तेव्हा त्यांच्या मनात आले की, कदाचित सफा मर्वाच्या दरम्यान सओ करणे पाप (गुनाह) असावे, कारण इस्लाममध्ये येण्यापूर्वी आम्ही दोन मूर्तींसाठी सओ करीत होतो. अल्लाहतआलाने या महावाक्यात त्यांच्या या शंकेस दूर केले. आता ही 'सओ' आवश्यक आहे; जिचा आरंभ सफा डोंगरापासून होतो, व समाप्ती 'मर्वह' डोंगरावर होते. (अयसरुत्तफासीर)

(४) 'अल्लाहतआलाने'आपल्या दिव्य पुस्तकात ज्या गोष्टी अवतरीत केल्या आहेत; त्या गोष्टी लपविणे इतके मोठे पाप आहे की, अल्लाहशिवाय इतर धिक्कार करणारे सुद्धा त्यावर धिक्कार करतात. हदीस मध्ये आहे की, ''ज्यास कोणी अशी गोष्ट विचारली की, जी त्यास माहित होती; परंतु त्याने ती लपविली तर कयामतच्या दिवशी त्याच्या तोंडात आगीची लगाम दिली जाईल.'' (अबुदाऊद व तिरमिझी)

إِنَّ الَّذِينَ كَفَرُوا وَمَاتُوا وَهُمْ كُفَّارٌ أُولَٰٓئِكَ عَلَيْهِمْ لَعْنَةُ اللّٰهِ وَالْمَلَٰٓئِكَةِ وَالنَّاسِ أَجْمَعِينَ ﴿١٦١﴾

नि:संशय जे अवज्ञाकारी (काफिर) अवज्ञा करता करतांच मरण पावतील त्यांच्यावर अल्लाहची, देवदूतांची आणि सर्व लोकांची फिटकार[१] आहे(१६१)

خٰلِدِينَ فِيهَا ۚ لَا يُخَفَّفُ عَنْهُمُ الْعَذَابُ وَلَا هُمْ يُنْظَرُونَ ﴿١٦٢﴾

ज्यात हे नेहमी राहतील; ना त्यांच्यावरील यातना कमी केल्या जातील, आणि ना त्यांना (यातनांपासून) थोडी ढिल दिली जाईल.(१६२)

وَإِلٰهُكُمْ إِلٰهٌ وَّاحِدٌ ۚ لَآ إِلٰهَ إِلَّا هُوَ الرَّحْمٰنُ الرَّحِيمُ ﴿١٦٣﴾ ع ١٩

आणि तुम्हा सर्वांचा उपास्य फक्त एक अल्लाह आहे. त्याच्याशिवाय कोणीही उपासनेच्या लायक नाही[२]. तो खूप दयाळू आणि खुपच कृपाळू आहे.(१६३)

إِنَّ فِي خَلْقِ السَّمٰوٰتِ وَالْأَرْضِ وَاخْتِلَافِ الَّيْلِ وَالنَّهَارِ وَالْفُلْكِ الَّتِي تَجْرِي فِي الْبَحْرِ بِمَا يَنْفَعُ النَّاسَ وَمَآ أَنْزَلَ اللّٰهُ مِنَ السَّمَآءِ مِنْ مَّآءٍ فَأَحْيَا بِهِ الْأَرْضَ بَعْدَ مَوْتِهَا وَبَثَّ فِيهَا مِنْ كُلِّ دَآبَّةٍ ۪ وَّتَصْرِيفِ الرِّيٰحِ وَالسَّحَابِ الْمُسَخَّرِ بَيْنَ السَّمَآءِ وَالْأَرْضِ لَأٰيٰتٍ لِّقَوْمٍ يَّعْقِلُونَ ﴿١٦٤﴾

आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, रात्र आणि दिवसाचे एकामागून एक येणे जाणे, जहाजांचे लोकांना नफा पोहचविणाऱ्या वस्तू घेऊन समुद्रात चालणे, आकाशातून पाण्याचा वर्षाव करून मृत पडलेल्या जमिनीत जिवंत करून[३] देणे; त्यांत (जमिनीत) सर्व प्रकारच्या प्राण्यांना फैलावून देणे, हवेची दिशा बदलणे, आणि ढग, जे आकाश आणि धरतीच्या दरम्यान फिरतात (ताब्यात असल्याप्रमाणे) यात बुध्दिमान लोकांसाठी, (अल्लाहच्या शक्तीच्या) निशाण्या आहेत.(१६४)

(१) यावरून हे माहित झाले की, ज्यांच्याबद्दल हे विश्वासपूर्वक ठाऊक आहे की, त्यांचा शेवट 'कुफ्र' वरच झाला आहे. त्यांचा धिक्कार (लानत) करणे बरोबर आहे. परंतु त्यांच्या व्यतिरिक्त कोणत्याही मोठ्यात मोठ्या पापी मुसलमानाचा धिक्कार करणे, त्यावर लानत करणे बरोबर नाही. कारण असे शक्य आहे की, मरण्यापूर्वी त्याने खरा पश्चात्ताप (सच्ची तौबा) केला असेल; किंवा अल्लाहने त्याच्या इतर पुण्याच्या कामांमुळे त्याच्या पापांना माफी देऊन टाकली असेल; ज्याचे ज्ञान आम्हाला होऊ शकत नाही. परंतु ज्या मोठ्या पापांवर लानत शब्द प्रयोग आला आहे, ती पापे (दुष्कृत्ये) करणाऱ्यांच्या बाबतीत सांगितले जाऊं शकते की, हे धिक्कारण्यायोग्य काम करीत आहे. या पापांपासून त्यांनी तौबा केली नाही. तर, अल्लाहच्या दरबारी असे लोक धिक्कार योग्य (मलऊन) ठरू शकतात.

(२) या महावाक्यात पुन्हा एकेश्वरवादाचे (तौहिद) निमंत्रण दिले गेले आहे. एकेश्वरवादाचे निमंत्रण मक्केच्या मुशरिक लोकांसाठी त्यांच्या ज्ञानाच्या पलिकडे होते. ते म्हणाले ''काय याने एवढ्या उपास्यांच्या जागी फक्त एकच उपास्य बनविला ? ही तर फार अजब गोष्ट आहे.'' (सू. सॉद-५) म्हणून त्यापुढील महावाक्यांत अल्लाह एक आहे. (तौहिद) याचे पुरावे सांगितले जात आहे.

(३) हे महावाक्य याहष्टीने महत्त्वपूर्ण आहे की, विश्वाची निर्मिती व त्याचे नियंत्रण आणि परिचालनाच्या बाबतीत सात मुख्य गोष्टींचा येथे उल्लेख आहे; जो इतर कोणत्याही महावाक्यात (आयातीत) नाही.

१) आकाश व जमिनीची निर्मिती ज्यांची लांबी रूंदी व विशालता वर्णन करता येण्याजोगी नाही २) रात्र आणि दिवसाचे एकामागून एक येणे दिवसाला प्रकाशमान आणि रात्रीला अंधकारमय करणे ज्यामुळे आर्थिक कारभार ही होऊ शकेल; आणि आराम सुद्धा होईल मग रात्रींचे मोठे होणे आणि दिवसाचे लहान होणे आणि पुन्हा या विरुद्ध दिवस मोठे होणे आणि रात्र लहान होणे ३) समुद्रात नावा आणि जहाजांचे चालणे ज्यांच्याद्वारे व्यापारी सफरी सुद्धा होतात व जीवनावश्यक व चैनीच्या वस्तू एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पोहचविल्या जातात. ४) पाऊस जो जमिनीच्या पुनर्जीवनासाठी व हिरवळीसाठी अत्यंत आवश्यक आहे. ५) सर्व प्रकारच्या प्राण्यांची निर्मिती जे सामानांची आणि प्रवाशांची ने आण करण्यासाठी शेतीसाठी मोठा हिस्सा या प्राण्यांपासून मिळतो. ६) सर्व प्रकारची हवा, सर्व प्रकारचे वारे, गरम वारे, थंड वारे पावसाचे वारे, बिनपावसाचे वारे पूर्वेची हवा, पश्चिमेचे वारे, उत्तरेचे वारे आणि दक्षिणेचे वारे सुद्धा मानवी जीवन व त्यांची आवश्यकता यास अनुरूप असतात. ७) ढग ज्यांना अल्लाहतआला जेथे इच्छितो, तेथे वर्षवितो, या साऱ्या गोष्टी अल्लाहतआलाची शक्ती, त्याचे सामर्थ्य व त्याच्या एकच होण्याचे पुरावे देत नाहीत काय? पूर्णपणे देतात. काय विश्वाची निर्मिती व त्याचे परिचालन यांत त्याचा कोणी सहभागी आहे? नाही, विश्वासपूर्वक नाही. मग त्याला सोडून दुसऱ्यास उपास्य (माबूद) व इच्छापूर्ती करणारे (हाजत रवा) मानणे, कुठली बुद्धीमानी आहे?

وَمِنَ النَّاسِ مَنْ يَّتَّخِذُ مِنْ دُوْنِ اللّٰهِ اَنْدَادًا
يُّحِبُّوْنَهُمْ كَحُبِّ اللّٰهِ ؕ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَشَدُّ حُبًّا لِّلّٰهِ ؕ
وَلَوْ يَرَى الَّذِيْنَ ظَلَمُوْٓا اِذْ يَرَوْنَ الْعَذَابَ ۙ اَنَّ
الْقُوَّةَ لِلّٰهِ جَمِيْعًا ۙ وَّ اَنَّ اللّٰهَ شَدِيْدُ الْعَذَابِ ﴿١٦٥﴾

काही लोक असे पण आहेत, जे दुसऱ्यांना अल्लाहचे शिरकतदार ठरवून त्यांच्यावर असे प्रेम करतात; जसे प्रेम अल्लाहतआलावर करावयास पाहिजे[१] आणि ईमानवाले, अल्लाहच्या प्रेमांत फारच लिप्त असतात[२]. बहुदेववाद्यांनी जर अल्लाहच्या प्रकोपाला पाहिले असते, (तर त्यांनी हे जाणून घेतले असते की) सर्व सामर्थ्य अल्लाहलाच आहे; आणि अल्लाहतआला कडक शिक्षा करणारा आहे. १६५

اِذْ تَبَرَّاَ الَّذِيْنَ اتُّبِعُوْا مِنَ الَّذِيْنَ اتَّبَعُوْا وَرَاَوُا الْعَذَابَ
وَتَقَطَّعَتْ بِهِمُ الْاَسْبَابُ ﴿١٦٦﴾

जेव्हा पुढारी लोक आपल्या अनुयायांकडून बेजार होऊन जातील, आणि शिक्षेला आपल्या डोळ्यांनी पाहून घेतील; आणि सर्व नाते संबंध तुटून जातील. १६६

وَقَالَ الَّذِيْنَ اتَّبَعُوْا لَوْ اَنَّ لَنَا كَرَّةً فَنَتَبَرَّاَ مِنْهُمْ
كَمَا تَبَرَّءُوْا مِنَّا ؕ كَذٰلِكَ يُرِيْهِمُ اللّٰهُ اَعْمَالَهُمْ
حَسَرٰتٍ عَلَيْهِمْ ؕ وَمَا هُمْ بِخٰرِجِيْنَ مِنَ النَّارِ ﴿١٦٧﴾

आणि अनुयायी लोक म्हणू लागतील की, जर आम्ही जगात दुसऱ्यांदा परतून जाऊ; आम्ही सुद्धा यांचेकडून असेच बेजार होऊन जाऊं. जसे हे (आज) आमच्यापासून (बेजार आहेत); अशाप्रकारे अल्लाहतआला त्यांना त्यांची कर्मे दाखवील; त्यांना खेद व्यक्त करण्यासाठी ते कधीच नरकाग्नीतून निघू शकणार नाही[३] १६७

يٰٓاَيُّهَا النَّاسُ كُلُوْا مِمَّا فِى الْاَرْضِ حَلٰلًا طَيِّبًا ۖ
وَّلَا تَتَّبِعُوْا خُطُوٰتِ الشَّيْطٰنِ ؕ اِنَّهٗ لَكُمْ عَدُوٌّ
مُّبِيْنٌ ﴿١٦٨﴾

लोकांनो! या जगात जेवढ्याही हलाल (विहीत) व पाक वस्तू आहेत, त्या खा व प्या. आणि शैतानाच्या पाऊल खुणांवर चालू नका[४]. तो तुमचा खुल्लम्खुल्ला दुश्मन आहे. १६८

اِنَّمَا يَاْمُرُكُمْ بِالسُّوْٓءِ وَالْفَحْشَآءِ وَاَنْ تَقُوْلُوْا
عَلَى اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿١٦٩﴾

तो तुम्हाला फक्त वाईटपणाचा व निर्लज्जपणाचा आणि अल्लाहतआलाच्या बाबतीत तुम्हाला त्या गोष्टी सांगण्याचा हुकूम देतो, ज्याचे तुम्हास (काहीही) ज्ञान नाही. १६९

وَاِذَا قِيْلَ لَهُمُ اتَّبِعُوْا مَآ اَنْزَلَ اللّٰهُ قَالُوْا بَلْ
نَتَّبِعُ مَآ اَلْفَيْنَا عَلَيْهِ اٰبَآءَنَا ؕ اَوَلَوْ كَانَ اٰبَآؤُهُمْ
لَا يَعْقِلُوْنَ شَيْـًٔا وَّلَا يَهْتَدُوْنَ ﴿١٧٠﴾

आणि जेव्हा त्यांना कधी सांगितले जाते की, अल्लाहने अवतरीत केलेल्या पुस्तकाचे आज्ञापालन करा. तर ते उत्तर देतात की, आम्ही तर त्याच मार्गावर चालू, ज्यावर आम्ही आमच्या वाडवडीलांना चालताना पावलो. जरी त्यांचे वाडवडील मूर्ख आणि आडमार्गी भटकणारे असो[५] १७०

وَمَثَلُ الَّذِيْنَ كَفَرُوْا كَمَثَلِ الَّذِىْ يَنْعِقُ بِمَا
لَا يَسْمَعُ اِلَّا دُعَآءً وَّنِدَآءً ؕ صُمٌّۢ بُكْمٌ
عُمْىٌ فَهُمْ لَا يَعْقِلُوْنَ ﴿١٧١﴾

(या) काफीरांचे उदाहरण, त्या जनावरांसारखे आहे जे, आपल्या गुराख्याचे ओरडणे आणि आवाजाला ऐकत असतात (समजत नाही.) ते बहिरे आहेत,मुके आहेत, आंधळे आहेत, त्यांना (काही) अक्कल नाही[६]. १७१

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا كُلُوْا مِنْ طَيِّبٰتِ مَا رَزَقْنٰكُمْ
وَاشْكُرُوْا لِلّٰهِ اِنْ كُنْتُمْ اِيَّاهُ تَعْبُدُوْنَ ﴿١٧٢﴾

हे ईमानवाल्यांनो! ज्या पाकसाफ वस्तू आम्ही तुम्हास देऊन ठेवल्या आहेत, त्यांना खा (आणि) प्या. आणि अल्लाहतआलाचे आभार माना जर तुम्ही खास त्याचीच भक्ती करीत असाल[७] १७२

(१) वर उल्लेख केलेले स्पष्ट पुरावे व त्यांच्या पुराव्यांना रद्द करणाऱ्या गोष्टी असतांना सुद्धा असे लोक आहेत, जे अल्लाहला सोडून दुसऱ्याला त्याचा शरीक (भागीदार) बनवून घेता. आणि त्यांच्याशी असे प्रेम करतात, जसे प्रेम अल्लाहशी करावयास पाहिजे. ह.मोहम्मद ﷺ च्या उदय काळांतच असे होते, असे नाही. तर शिर्कचे सर्व प्रकार आज देखील सार्वत्रिक आहेत. किंबहुना इस्लामच्या नांव घेणाऱ्यांमध्ये सुद्धा हा रोग घर करून आहे. त्यांनी सुद्धा अल्लाहला सोडून इतकेच काय कोण्या बुजूर्ग पीर फकीर बरोबर उठबस करणाऱ्यांना सुद्धा आपला मददगार आश्रयस्थान व आपली इच्छापूर्ती करणारा बनवून ठेवले आहे. किंबहुना त्यांच्याशी त्यांचे प्रेम अल्लाहच्या प्रेमापेक्षाही जास्त आहे. आणि अशा लोकांना एकेश्वरवादाचा उपदेश असा खटकतो; जसा मक्काच्या बहुदेववाद्यांना त्या एकेश्वरवादाच्या उपदेशाने त्रास होत असे. ज्याचे खंडन अल्लाहतआलाने या महावाक्यात अशा प्रकारे केलेले आहे. ''आणि जेव्हा एकट्या अल्लाहचाच उल्लेख केला जातो, तेव्हा जे लोक परलोकावर विश्वास ठेवत नाही, त्यांची

अंत:करणे चपापू लागतात. आणि अल्लाहशिवाय इतर (खोट्या उपास्यांचे) नांवे घेतले जातात, तेव्हा तर हे लोक खूष होऊन जातात.'' (सू. जुमर - ४५)

(२) तथापि ईमानवाल्यांना बहुदेववाद्यांच्या अगदी उलट अल्लाहतआलाशीच सर्वात जास्त प्रेम असते. कारण बहुदेववादी जेव्हा समुद्र वगैरेमध्ये फसून जातात; तेव्हा आपल्या उपास्यांना विसरून जातात; आणि तेथे अल्लाहतआलालाच साद घालतात. ''मग जेव्हा लोक गलबतावर स्वार होता, तेव्हा फार प्रांजळपणे अल्लाहचीच भक्ती करून त्यालाच बोलावितात''. (सू. अन्कबूत - ६५) ''आणि जेव्हा समुद्राच्या लाटा (जहाजातील) लोकांवर सावलीप्रमाणे आच्छादून जातात; तेव्हा ते प्रांजळपणाने अल्लाहचीच भक्ती करून त्यालाच बोलावू लागतात.'' (सू. लुकमान - ३२) ''एकाएकी जहाजास वादळाचा झोका येतो आणि लाटा हरेक बाजूने त्यांच्यावर चालल्या येतात, आणि ते पक्के समजतात की, घेरलो गेलो; तेव्हा फक्त अल्लाहलाच शुद्ध भावाने मानून त्याच्याशी प्रार्थना करू लागतात.'' (सू. यूनुस - २२)

(३) परलोकांत पीर आणि गादीवर बसलेल्यांची असहायता आणि त्यांची बेपर्वाई पाहून बहुदेववादी खेद व्यक्त करतील, परंतु तेथे या खेद व्यक्त करण्याने काहीही फायदा होणार नाही. अरेरे! त्यांनी या जगातंच शिर्कपासून पश्चात्ताप केला असता तर किती बरे झाले असते!

(४) म्हणजे शैतानाच्या नादी लागून अल्लाहने विहीत (हलाल) केलेल्या वस्तूंना निषिद्ध (हराम) करू नका. ज्याप्रमाणे बहुदेववाद्यांनी केले की, ते आपल्या मूर्तींच्या नांवे सोडलेल्या जनावरांना आपल्यासाठी निशिष्द (हराम) करून घेत असत. ज्याचे स्पष्टीकरण सू.अन्आममध्ये येईल. हदीसीमध्ये आहे, नबी करीम ﷺ नी सांगितले,''अल्लाहतआला म्हणतो, मी माझ्या बंद्यांना एकाग्र स्वभावाचे निर्माण केले आहे; पण शैतानांने त्यांना त्यांच्या धर्मापासून भटकवून टाकले आणि ज्या वस्तू मी त्यांच्यासाठी हलाल (विहीत) केल्या होत्या त्या, शैतानाने त्यांच्यासाठी हराम (निषिद्ध) करून टाकल्या''(सहीह मुस्लीम हदीस क्र.२८६५)

(५) आजपण बिदअत करणाऱ्यांना समजाविले जाते की, या बिदअतींचे धर्मांत काही स्थान नाही; तर ते हेच उत्तर देतात की, या गोष्टी तर आमच्या वाडवडीलांपासून चालत आल्या आहेत. वास्तविक पाहता वाडवडील सुद्धा धार्मिक समजापासून अजाण आणि मार्गदर्शनापासून वंचित राहू शकतात. याकरीता धर्मशास्त्रांचे (ठोस) पुराव्यांच्या विरोधात वाडवडीलांचे अंधानुकरण किंवा आपल्या इमाम आणि धर्मपंडीतांचे अनुकरण, चूकीचे आहे. कुरआन व हदीशीच्या पुराव्याशिवाय त्यांच्या गोष्टीला मान्य करणे निव्वळ मार्गभ्रष्ट होणे आहे. अल्लाहतआला मुसलमानांना या मार्गभ्रष्टतेच्या दलदलीतून बाहेर काढो! (आमीन)

(६) या काफिरांचे उदाहरण, ज्यांनी आपल्या वाडवडीलांच्या अनुकरणांत आपली अक्कल हुशारी गहाण टाकून ठेवली आहे; त्या जनावरांसारखे आहे, ज्यांना गुराखी बोलवतो आणि साद घालतो, ती जनावरे आवाज तर ऐकतात; पण ते हे समजत नाही, त्यांना का बोलावले व का साद घातली जात आहे? याचप्रमाणे हे अनुकरण करणारे, (मुकल्लदीन) पण बहिरे आहेत की, सत्याचा आवाज ऐकत नाही. मुके आहेत की सत्य त्यांच्या जिभेने बोलले जात नाही. आंधळे आहेत की, सत्य पाहण्याला असमर्थ आहेत. आणि मूर्ख (अक्कलशुन्य) आहेत, की सत्याचे आवाहन व एकेश्वरवाद व सुन्नतचे आवाहन समजण्याला असमर्थ (कासिर) आहेत. येथे 'दुआ' ने जवळचा आवाज व 'निदा' ने दूरचा आवाज अभिप्रेत आहे.

(७) या ठिकाणी ईमानवाल्यांना त्या सर्व वस्तूंना ज्या पाकसाफ आहेत, खाण्याचा आदेश आहे, ज्या अल्लाहने हलाल (विहीत) केल्या आहेत. आणि यावर अल्लाहचे आभार मानण्याची ताकीद आहे. याच्याने एक तर हे ठाऊक झाले की, अल्लाहच्या हलाल केलेल्या वस्तूच पाक आणि चोख्या आहेत. हराम केलेल्या जिनसा पाक (साफ) नाही. जरी त्या मनेच्छाला कितीही का प्रिय वाटेना! (जसे युरोपवाल्यांना, डुकराचे मांस प्रिय आहे.) दुसरे असे की, मूर्तींवर नामनिर्देश केलेली जनावरे आणि वस्तू बहुदेववादी आपल्यावर निषिद्ध (हराम) करून घेत असत. (ज्याचे स्पष्टीकरण सू. अनआममध्ये आहे.) बहुदेववाद्यांचे हे कृत्य चुकीचे आहे. आणि अशाप्रकारे एक हलाल वस्तू हराम होत नाही. तुम्ही त्यांच्याप्रमाणे त्यांना हराम करू नका. (हराम फक्त तेच आहे. ज्याचा खुलासा, याच्यानंतरच्या महावाक्यात आहे.) तिसरे असे की, जर तुम्ही एकाच अल्लाहची भक्ती करणारे आहात, तर त्याच्या आभार प्रदर्शनाकडे लक्ष असू द्या.

إِنَّمَا حَرَّمَ عَلَيْكُمُ الْمَيْتَةَ وَالدَّمَ وَلَحْمَ الْخِنْزِيرِ وَمَآ أُهِلَّ بِهِ لِغَيْرِ اللَّهِ ۖ فَمَنِ اضْطُرَّ غَيْرَ بَاغٍ وَّلَا عَادٍ فَلَآ إِثْمَ عَلَيْهِ ۚ إِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿١٧٣﴾

**तुम्हास, मुर्दाड आणि रक्त, आणि डुकराचे मांस आणि प्रत्येक ती गोष्ट जी अल्लाहशिवाय इतरांच्या नावावर नामजद केली जाईल, हराम (निषिद्ध)(१) आहे. यावर ज्याचा नाइलाज होऊन जाईल. आणि जो मर्यादेबाहेर जाणारा व जियादती करणारा नसेल; त्याच्यावर यांच्या खाण्यात काहीही पाप नाही. अल्लाहतआला क्षमा करणारा व दयाळू आहे** (१७३)

(१) या महावाक्यात चार हराम केलेल्या गोष्टींचा उल्लेख आहे. ज्यामुळे मनांत अशी शंका येते की, हराम फक्त याच चार वस्तू आहेत. जेव्हा याच्याशिवाय ही अनेक वस्तू हराम आहेत. याकरीता प्रथम तर हे समजून घेतले पाहिजे की, हा (हस्र) विशिष्ट परिस्थिती (खास सियाक) मध्ये आला आहे. म्हणजे बहुदेववादी आपल्या करतुत मध्ये हे शामिल करून घेत की, ते हलाल जनावरांना पण हराम ठरवून टाकत असत. अल्लाहतआलाने म्हटले की ते हराम नाही. हराम तर फक्त या चार गोष्टीच आहेत. यासाठी हा प्रतिबंध जास्तीचा आहे. म्हणजे याच्या शिवायही दुसऱ्या निषिद्ध वस्तू आहेत, ज्यांचा येथे उल्लेख नाही. दुसरे असे की, हदीसमध्ये ती तत्त्वे जनावरांच्या विहीत आणि निषिद्ध करण्याचे वर्णन करून देण्यात आली आहेत, ती महावाक्यांच्या खऱ्या (खऱ्या) भाष्यासाठी (नजरे) समोर ठेवली पाहिजेत. जंगली श्वापदांमध्ये ती जनावरे जी 'जूनाब' (जी आपल्या सुळ्यांनी शिकार करतात) आणि पक्ष्यांमध्ये 'जूमिखलब' (जे पंज्यांनी शिकार करतात) हराम आहेत. तिसरे असे की, ज्या जनावरांचे निषिद्ध होणे हदीसने सिद्ध आहे उदा. गाढव,कुत्रा वगैरे पण हराम आहेत. यामुळे या गोष्टीकडे अंगुलीनिर्देश होतो की, हदीस सुद्धा कुरआन करीमप्रमाणे धार्मिक प्रमाण आहेत. आणि धर्म दोघांच्या मानण्यानेच संपूर्ण होतो. हदीसला दृष्टीआड टाकून, फक्त कुरआनानेच धर्म पूर्ण होत नाही. मुर्दाडने अभिप्रेत प्रत्येक ते जनावर आहे जे जबह केल्याशिवाय असेच मारून टाकले जावे, किंवा कुठल्याही अपघातात (ज्याचे स्पष्टीकरण सू.माईदामध्ये आहे.) मरण पावले असावे. किंवा धर्मशास्त्रांच्या पद्धतीविरूद्ध जबह केलेले असते. उदाहरणार्थ गळा दाबून दिला जावा, किंवा दगड काठी वगैरेंनी मारले जावे. किंवा आजकाल मशीनने जबह करण्याची पद्धत आहे; ज्यांत झटक्याने मारण्यात येते. तथापि हदीसमध्ये ते मुर्दाड जनावर हलाल करून देण्यात आले आहे, एक मासे, दुसरे टोळ, हे मुर्दाडच्या आदेशावरून वगळण्यात आले आहेत. रक्ताने ते अभिप्रेत आहे, जे जबह करतेवेळी निघते आणि वाहते. मांसाबरोबर जे रक्त राहून जाते ते हलाल आहे. येथे पण हदीसीप्रमाणे दोन रक्त हलाल आहेत. एक काळीज (यकृत) व दुसरे प्लीहा ( pleen ) खिंजीर म्हणजे डुकरांचे मांस जे निर्लज्जतेमध्ये सर्वांत वाईट जनावर आहे. अल्लाहने त्याला हराम ठरविले आहे. ''वमा उहिल्ल'' ते जनावर किंवा एखादी वस्तू जिला अल्लाहशिवाय इतरांच्या नांवाने पुकारले जावे. याच्याने ते जनावर आहे जे अल्लाह शिवाय इतरांसाठी जबह केले जावे, जसे अरब बहुदेववादी 'लात' व 'उज़्ज़ा' वगैरेच्या नांवावर ज़बह करीत असत. या आगीच्या नांवावर जसे अग्नीपूजक करीत असत.

आणि यातच ती जनावरे पण येतात, जी जाहिल (अडाणी) मुसलमान मृत पावलेल्या बुजुर्गांच्या प्रति श्रद्धेत आणि प्रेमात त्यांची प्रसन्नता आणि जवळीक मिळविण्यासाठी किंवा त्यांच्या भीतीपोटी आणि त्यांच्याशी आशा बाळगून कबरीवर त्यांच्या स्थानांवर जबह करतात; किंवा तेथील मुजावरांना (कबरपुजारी) बुजुर्गांच्या नियाजच्या नांवावर देऊन येतात (जसे पुष्कळशा बुजुर्गांच्या कबरीवर बोर्ड लावलेले आहेत. उदा.'दाता' साहब च्या नियाजसाठी येथे बकरे जमा केले जावेत) या जनावरांना जबह करतेवेळी जरी अल्लाहचेच नाव घेऊन जबह केले असेल तरी हरामच आहे. कारण याचा उद्देश अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करणे नाही; तथापि कबरवाल्यांची प्रसन्नता, अल्लाहशिवाय दुसऱ्याचा मान सन्मान (ताजीम) किंवा त्यांचे भय, किंवा अल्लाहशिवाय दुसऱ्यांकरीता काही भय किंवा आशा बाळगणे, जे शिर्क आहे. या पद्धतीने जनावरांशिवाय ज्या वस्तूला अल्लाहशिवाय इतरांसाठी नजर नियाज आणि चढावा म्हणून असतील ते सर्व हराम ठरतील. जसे कबरींवर घेऊन जाऊन किंवा तेथून खरेदी करून कबरीच्या आजूबाजूला फकीर आणि गरीब लोकांना खाद्यांच्या डेगा किंवा लंगर किंवा मिठाई किंवा पैसे वाटणे किंवा तेथे ठेवलेल्या पेटीत नजर नियाजसाठी पैसे टाकणे किंवा उर्साच्यावेळी तेथे दूध पोहचविणे हे सर्व काम हराम आणि अयोग्य आहे. कारण की, हे सर्व कामे अल्लाहशिवाय इतरांसाठी नजर नियाजचे प्रकार आहेत. आणि नजरसुद्धा नमाज, उपवास वगैरे भक्ती (इबादत) सारखी एक भक्ती आहे. आणि भक्तीचा प्रत्येक प्रकार फक्त एक अल्लाहसाठीच खास आहे. याचसाठी हदीसमध्ये आहे की, ''ज्याने अल्लाहशिवाय इतरांसाठी जनावर जबह केले, तो फिटकारीत (मलऊन) आहे.'' (सहीहु जामिउस्सगीर जि.२ पृष्ठ क्र. १०२४) तफसीर अज़ीज़ी मध्ये तफसीर निशापुरीच्या हवाल्याने म्हटले आहे की, ''धर्मपंडीतांचे या गोष्टीवर मतैक्य (इजमाअ) आहे की, कोण्या मुसलमानाने, कोणी जनावर अल्लाहशिवाय इतराची जवळीक साधन्यासाठी जबह केले तर तो मुरतद होऊन जाईल; आणि त्याचे जबह केलेले (जबीहा) एका मुरतद चे जबह केलेले असेल.'' (तफसीर अज़ीज़ी पृष्ठ क्र.६११ अशरफुल हवाशीच्या हवाल्याने)

إِنَّ الَّذِيْنَ يَكْتُمُوْنَ مَآ اَنْزَلَ اللّٰهُ مِنَ الْكِتٰبِ
وَيَشْتَرُوْنَ بِهٖ ثَمَنًا قَلِيْلًا ۙ اُولٰٓئِكَ مَا يَاْكُلُوْنَ
فِيْ بُطُوْنِهِمْ اِلَّا النَّارَ وَلَا يُكَلِّمُهُمُ اللّٰهُ يَوْمَ
الْقِيٰمَةِ وَلَا يُزَكِّيْهِمْ ۚۖ وَلَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿١٧٤﴾

नि:संशय जे लोक अल्लाहने अवतरीत केलेल्या पुस्तकाला लपवतात; आणि त्याला अत्यल्प किंमतीत विकतात. तुम्ही खात्रीपूर्वक समजा की, हे आपल्या पोटांत आग भरत आहेत. कयामतच्या दिवशी अल्लाहतआला त्यांचेशी बातचित पण करणार नाही. आणि त्यांना (गुन्ह्यांपासून) पाकसाफ पण करणार नाही; उलट त्यांचेसाठी यातना होणारी शिक्षा आहे. (१७४)

اُولٰٓئِكَ الَّذِيْنَ اشْتَرَوُا الضَّلٰلَةَ بِالْهُدٰى وَالْعَذَابَ
بِالْمَغْفِرَةِ ۚ فَمَآ اَصْبَرَهُمْ عَلَى النَّارِ ﴿١٧٥﴾

हे ते लोक आहेत, ज्यांनी मार्गभ्रष्टतेला मार्गदर्शनाऐवजी आणि शिक्षेला माफीच्याऐवजी खरेदी करून घेतले आहे. हे लोक अग्नीची शिक्षा किती सहन करू शकणार आहेत? (१७५)

ذٰلِكَ بِاَنَّ اللّٰهَ نَزَّلَ الْكِتٰبَ بِالْحَقِّ ۗ وَاِنَّ الَّذِيْنَ
اخْتَلَفُوْا فِي الْكِتٰبِ لَفِيْ شِقَاقٍ بَعِيْدٍ ﴿١٧٦﴾

या शिक्षेचे कारण हेच आहे की, अल्लाहतआलाने सत्य पुस्तक अवतरीत केले आहे. आणि नि:संशय ज्या लोकांनी या पुस्तकांत मतभेद केला; ते फार दुर्देवात पडले आहेत (१७६)

لَيْسَ الْبِرَّ اَنْ تُوَلُّوْا وُجُوْهَكُمْ قِبَلَ الْمَشْرِقِ
وَالْمَغْرِبِ وَلٰكِنَّ الْبِرَّ مَنْ اٰمَنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ
وَالْمَلٰٓئِكَةِ وَالْكِتٰبِ وَالنَّبِيّٖنَ ۚ وَاٰتَى الْمَالَ عَلٰى
حُبِّهٖ ذَوِي الْقُرْبٰى وَالْيَتٰمٰى وَالْمَسٰكِيْنَ وَابْنَ
السَّبِيْلِ ۙ وَالسَّآئِلِيْنَ وَفِي الرِّقَابِ ۚ وَاَقَامَ الصَّلٰوةَ
وَاٰتَى الزَّكٰوةَ ۚ وَالْمُوْفُوْنَ بِعَهْدِهِمْ اِذَا عٰهَدُوْا ۚ
وَالصّٰبِرِيْنَ فِي الْبَاْسَآءِ وَالضَّرَّآءِ وَحِيْنَ الْبَاْسِ ۗ
اُولٰٓئِكَ الَّذِيْنَ صَدَقُوْا ۖ وَاُولٰٓئِكَ هُمُ الْمُتَّقُوْنَ ﴿١٧٧﴾

सर्व चांगुलपणा पूर्व आणि पश्चिमेकडे तोंड करण्यातच नाही(१); परंतु वास्तविक भला माणूस तो आहे, जो अल्लाहतआलावर, कयामतच्या दिवसावर, देवदूतांवर, अल्लाहच्या पुस्तकावर आणि पैगंबरांवर ईमान (विश्वास) ठेवणारा असेल; जो मालाशी (धनाशी) प्रेम असून सुद्धा नातेवाईक,अनाथ,गरीब,प्रवासी आणि याचना करणाऱ्यांना देत असेल. गुलामांना मुक्त करेन, नमाजची नियमितता आणि जकात देत असेल, जेव्हा वायदा करेल, तेव्हा त्याला पूर्ण करेल, तंगदस्ती, दु:ख,यातना आणि लढाईच्यावेळी धैर्यशील राहील; हेच सच्चे लोक आहेत आणि हेच अल्लाहला भिणारे आहेत (१७७)

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا كُتِبَ عَلَيْكُمُ الْقِصَاصُ فِي
الْقَتْلٰى ۖ اَلْحُرُّ بِالْحُرِّ وَالْعَبْدُ بِالْعَبْدِ وَالْاُنْثٰى
بِالْاُنْثٰى ۖ فَمَنْ عُفِيَ لَهٗ مِنْ اَخِيْهِ شَيْءٌ فَاتِّبَاعٌ ۢ
بِالْمَعْرُوْفِ وَاَدَآءٌ اِلَيْهِ بِاِحْسَانٍ ۖ ذٰلِكَ تَخْفِيْفٌ
مِّنْ رَّبِّكُمْ وَرَحْمَةٌ ۖ فَمَنِ اعْتَدٰى بَعْدَ ذٰلِكَ
فَلَهٗ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿١٧٨﴾

हे ईमानवाल्यांनो! तुम्हावर ज्यांचा वध झालेला आहे त्याचा बदला (किसास) घेणे अनिवार्य (फर्ज) केले गेले आहे; आज़ादच्या बदल्यात आज़ाद,गुलामच्या बदल्यात गुलाम, स्त्रीच्या बदल्यात(२) स्त्री. हां! ज्या कोणाला आपल्या भावाकडून माफी दिली जाईल;त्याने भलेपणाचा अवलंब केला पाहिजे, आणि राजीखुषीने (आसानिसे) दियत (प्राणमूल्य) अदा केली पाहिजे(३). तुमच्या पालनकर्त्याकडून हे सोपे करणे व (त्याची) दया आहे(४). याच्यानंतरही जो शिरजोरी (सरकशी) करेल, त्याला यातनादायक शिक्षा(५) होईल (१७८)

وَلَكُمْ فِي الْقِصَاصِ حَيٰوةٌ يّٰٓاُولِي الْاَلْبَابِ لَعَلَّكُمْ
تَتَّقُوْنَ ﴿١٧٩﴾

(हे) बुद्धीमंतांनो! किसास (बदल्यात) मध्ये तुमच्यासाठी जीवन आहे. याच्यामुळे तुम्ही (नाहक खून करण्यापासून) थांबाल(६) (१७९)

१) हे महावाक्य किबल्याच्या बदलासंदर्भात अवतरित झाले आहे. एक तर यहूदी आपल्या किबल्याला (जो बैतुल मुकद्दसचा पश्चिमी भाग आहे.) आणि ख्रिस्ती आपल्या किबल्याला (जो बैतुल मुकद्दसचा पूर्व भाग आहे.) मोठे महत्त्व देत होते. आणि याच्यावर गर्व करीत होते. दुसरीकडे मुसलमानांच्या किबला बदलावर टिकाटिप्पणी करीत होते. त्यामुळे कधी कधी काही मुसलमानाची मने दु:खी होत असत. अल्लाहतआलाने म्हटले पूर्व किंवा पश्चिमेला तोंड करणे स्वत:च (बजाते खुद) काही पुण्य नाही; पण हा तर फक्त एक केंद्रीय व एकत्रिकरण प्राप्त करण्याची एक पद्धत आहे. दुसरे, पुण्य तर त्या श्रद्धांवर ईमान ठेवण्याचे आहे; जे अल्लाहतआलाने वर्णन केले आहे; आणि त्या कृत्यांना आणि चारित्र्याला अंगिकारणे आहे, ज्याची ताकीद त्याने केली आहे. मग पुढे त्या श्रद्धा आणि कर्मांचा उल्लेख आहे. अल्लाहवर ईमान हे आहे की, त्याला आपल्या व्यक्तीत्त्वात व विशेषणांत एकटा, सर्व दोषांपासून पवित्र आणि कुर्‌आन व हदीसमध्ये वर्णन केलेल्या अल्लाहतआलाच्या सर्व गुणांना कुठलाही बदल किंवा कमी जास्त

केल्याशिवाय जसेच्या तसे मान्य केले जावे. परलोकाला निर्णयाचा दिवस होणे, कयामत व पुन्हा जिवंत करणे (हश्र व नश्र) आणि स्वर्ग आणि नरकावर विश्वास ठेवला जावा. 'अल्‌किताब' ने अभिप्रेत सर्व आकाशी ग्रंथाच्या सत्य होण्यावर ईमान आणणे होय. आणि देवदूतांच्या अस्तित्वावर आणि सर्व पैगंबरावर विश्वास ठेवला जावा. या विश्वास ठेवण्याच्या गोष्टी शिवाय त्या कर्मांना अंगिकारले जावे, ज्याचे स्पष्टीकरण या महावाक्यांत आहे. म्हणजे धनाचे प्रेम असतांना सुद्धा धन अल्लाहच्या मार्गात खर्च करावा. तंगदस्ती, नुकसान किंवा आजार आणि युद्धात. या तिन्ही अवस्थेत धैर्यशील रहाणे, म्हणजे अल्लाहच्या आदेशांपासून तोंड न फिरविणे, फारच कठीण होते. यामुळे या स्थितींना विशेष म्हणून वर्णन करण्यात आले आहे.

२) अज्ञात काळात तर कुठलीही व्यवस्था आणि कायदा तर नव्हताच. म्हणून शक्तीशाली कबिले दुर्बळ कबिल्यांवर जसा इच्छित तसा जोर जुलूम करीत. एक जुलूम अशा प्रकारचा होता की, कोण्या शक्तिशाली कबिल्याच्या माणसाचा वध झाला, तर ते फक्त खुन्याचा वध करण्याऐवजी खुन्याच्या कबिल्याचे कित्येक पुरूष किंबहुना कधी कधी तर पूर्ण कबिल्यालाच नष्ट करून टाकण्याचा प्रयत्न करीत. आणि स्त्रियांच्या ऐवजी पुरूषाला आणि गुलामाच्या ऐवजी स्वतंत्र माणसाचा खून करीत असत. अल्लाहतआलाने या भेदभावाला संपवून म्हटले की, जो खुनी असेल, बदल्यात (किसास) त्याचाच खून केला जाईल. खुनी, स्वतंत्र माणूस असेल तर बदल्यात तोच स्वतंत्र माणूस आणि गुलाम असेल तर बदल्यांत तोच गुलाम आणि स्त्री असेल, तर बदल्यात तीच स्त्री कत्तल केली जाईल. असे होणार नाही की, गुलामाच्या जागेवर स्वतंत्र माणूस आणि स्त्रीच्या जागी पुरूष. एका पुरूषाच्या ऐवजी किती तरी पुरूष याचा असा अर्थ नाही की, जर पुरूष स्त्रीचा खून करतो तर बदल्यांत कोण्या स्त्रीचा वध केला जाईल. किंवा स्त्री पुरूषाचा वध करून टाकेल तर पुरूषाचा खून केला जाईल (जसा लिखित शब्दांनी ध्वन्यर्थ निघू शकतो.) किंबहुना हे शब्द अवतरीत होण्याच्या कारणांच्या (शानेनुजुल) दृष्टीने, हे स्पष्ट होते की, बदल्यात खुन्याचाच वध केला जाईल; मग तो पुरूष असो अथवा स्त्री, शक्तीशाली असो किंवा दुर्बल ''सर्व मुसलमानांचे रक्त (पुरूष असो अगर स्त्री) समान आहेत.'' (अबुदाऊद) जणू महावाक्यांचा तोच ध्वन्यर्थ आहे. जो कुरआन करीमचे दुसरे महावाक्य ''अन्‌नफसो बिन नफसी'' (सू. माइदः-४५) चा आहे. हनफी, याचा पाठपुरावा करतांना म्हणतात की, मुसलमानाला काफिरच्या बदल्यात (किसास) ठार केले जाईल. परंतु धर्मपंडीतांचा मोठा समूह (जम्हुर उलमा) याला मान्यता देत नाही. कारण की हदिसीमध्ये स्पष्टीकरण आहे की, ''मुसलमान काफिरच्या बदल्यांत ठार केला जाणार नाही.'' (स. बुखारी ह.क्र.६९१५) (फत्हुल कदीर) कृपया पहावे पृष्ठ क्र.१४८ समास आ.४५ च्या अनुषंगाने सू. माईदा)

३) माफ करण्याचे दोन प्रकार आहेत. एक तर आर्थिक भरपाई म्हणजे दियत (प्राणमूल्य) घेतल्याशिवाय, अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी माफ करून टाकणे. दुसरा प्रकार किसासच्या ऐवजी दियत (प्राणमूल्य) कबुल करून घेणे. जर दुसरी पद्धत अंगिकारली गेली, तर सांगण्यात येत आहे की, प्राणमूल्य घेणाऱ्याने भलाईची वागणूक ठेवावी, ''व अदा उन इलैहे बिएहसान'' मध्ये खुन्याला सांगण्यात येत आहे की, त्रास दिल्याशिवाय चांगल्याप्रकारे दियत (प्राणमूल्य) अदा केले जावे. वधित माणसाच्या वारसदारांनी त्याचा प्राण वाचवून त्याच्यावर उपकार केला आहे. याचा बदला तसाच (उपकारांबरोबरच) दिला जावा. 'हल् जजाऊल एहसानी, इल्लल एहसान'' (सू. अर्रहमान-६०) (उपकाराच्या बदली उपकार)

४) हे सोपे करणे आणि दया (म्हणजे किसास, माफी किंवा दियत तीन प्रकार) अल्लाहकडून खास तुमच्यावर झाली आहेत. नाहीतर याच्यापूर्वी तौरातवाल्यांसाठी किसास किंवा माफी होती .दियत (प्राणमूल्य) नव्हते. इंजीलवाल्यांमध्ये (ख्रिस्त्यांमध्ये) फक्त माफीच होती. किसास नव्हता, की दियत नव्हती.

५) दियत कबूल केल्यावरसुद्धा, खून करून टाकला तर ही शिरजोरी आणि आगंतुकपणा (जियादती) आहे. त्याची शिक्षा त्याला इहलोकांत आणि परलोकांत भोगावी लागेल.

६) जेव्हा खुन्याला हे भय राहील की, माझापण किसास मध्ये खून करण्यांत येईल. तर त्याची खून करण्याची हिंमत होणार नाही. आणि ज्या समाजात हा किसासचा कायदा लागूं केला जातो; तेथे हे भय, समाजाला खून आणि रक्तपाता पासून सुरक्षित ठेवते. ज्यामुळे समाजांत खुपच सुखशांती नांदते. याची पडताळणी आजपण सौदी समाजात केली जावू शकते. जेथे इस्लामच्या बांधीव मर्यादा लागू करण्याच्या या बरकती, अल्‌हम्दो लिल्लाह्! अस्तित्वात आहेत. अरेरे ! दुसऱ्या इस्लामी देशांनी सुद्धा इस्लामच्या बांधीव मर्यादा लागू करून, आपल्या जनतेला हे शांतीपूर्ण जीवन मिळवून दिले असते; तर किती बरे झाले असते!

كُتِبَ عَلَيْكُمْ إِذَا حَضَرَ أَحَدَكُمُ الْمَوْتُ إِن تَرَكَ خَيْرًا ۖ
الْوَصِيَّةُ لِلْوَالِدَيْنِ وَالْأَقْرَبِينَ بِالْمَعْرُوفِ ۖ
حَقًّا عَلَى الْمُتَّقِينَ ﴿١٨٠﴾

तुमच्यावर अनिवार्य केले गेले आहे की, जेव्हा तुमच्यातून कोणी मरू लागेल, आणि संपत्ती सोडून जात असेल तर आपल्या आईबाप आणि नातेवाईकांसाठी भलाईपणाने मृत्यूपत्र करून जावे[१]. अल्लाहला भिणाऱ्यांवर हे (करणे) जरूरीचे आणि सिद्ध आहे. (१८०)

فَمَن بَدَّلَهُ بَعْدَمَا سَمِعَهُ فَإِنَّمَا إِثْمُهُ عَلَى الَّذِينَ
يُبَدِّلُونَهُ ۚ إِنَّ اللَّهَ سَمِيعٌ عَلِيمٌ ﴿١٨١﴾

आता जो मनुष्य याला ऐकल्यावर त्यांत बदल करून टाकेन, त्याचे पाप बदल करणाऱ्यालाच लागेल. खरोखर अल्लाहतआला ऐकणारा व जाणणारा आहे. (१८१)

فَمَنْ خَافَ مِن مُّوصٍ جَنَفًا أَوْ إِثْمًا فَأَصْلَحَ
بَيْنَهُمْ فَلَا إِثْمَ عَلَيْهِ ۚ إِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿١٨٢﴾

परंतु जो मनुष्य मृत्यूपत्र करणाऱ्याची तरफदारी किंवा गुन्ह्याचे (पापाचे) मृत्यूपत्र करण्यापासून भिईल[२]; मग तो त्यांच्या आपसात सुधारणा करून देईल; तर त्याच्यावर (काही एक) पाप नाही; अल्लाहतआला क्षमाकर्ता व दयाळू आहे. (१८२)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا كُتِبَ عَلَيْكُمُ الصِّيَامُ كَمَا
كُتِبَ عَلَى الَّذِينَ مِن قَبْلِكُمْ لَعَلَّكُمْ تَتَّقُونَ ﴿١٨٣﴾

हे ईमानवाल्यांनो! तुमच्यावर उपवास अनिवार्य केले गेले; ज्याप्रमाणे तुमच्या पूर्वीच्या लोकांवर अनिवार्य केले गेले होते; कारण की तुम्ही अल्लाहला भ्यावे[३] (तकवा इखतियार करो) (१८३)

أَيَّامًا مَّعْدُودَاتٍ ۚ فَمَن كَانَ مِنكُم مَّرِيضًا أَوْ
عَلَىٰ سَفَرٍ فَعِدَّةٌ مِّنْ أَيَّامٍ أُخَرَ ۚ وَعَلَى الَّذِينَ
يُطِيقُونَهُ فِدْيَةٌ طَعَامُ مِسْكِينٍ ۖ فَمَن تَطَوَّعَ خَيْرًا
فَهُوَ خَيْرٌ لَّهُ ۚ وَأَن تَصُومُوا خَيْرٌ لَّكُمْ ۖ إِن كُنتُمْ
تَعْلَمُونَ ﴿١٨٤﴾

(हे) मोजण्याचे (गिनती) थोडे काही दिवस आहेत; परंतु तुमच्यातून जी व्यक्ती आजारी असेल, किंवा प्रवासात असेल, तर त्याने इतर दिवसांत गिनतीला पुरी[४] करून घ्यावे आणि याची ताकद न ठेवणाऱ्याने[५] फिदया (त्याची किंमत मुआवेजा) मध्ये, एका गरीबाला जेवण द्यावे. या उप्पर जो कोणी पुण्यांत पुढे सरसावेल, ते त्याच्यासाठी उत्तम[६] आहे. परंतु तुमच्याकरीता उपवास ठेवणेच उत्तम काम आहे; जर तुम्हाला याची जाण असेल (१८४)

شَهْرُ رَمَضَانَ الَّذِي أُنزِلَ فِيهِ الْقُرْآنُ هُدًى لِّلنَّاسِ
وَبَيِّنَاتٍ مِّنَ الْهُدَىٰ وَالْفُرْقَانِ ۚ فَمَن شَهِدَ مِنكُمُ
الشَّهْرَ فَلْيَصُمْهُ ۖ وَمَن كَانَ مَرِيضًا أَوْ عَلَىٰ سَفَرٍ
فَعِدَّةٌ مِّنْ أَيَّامٍ أُخَرَ ۗ يُرِيدُ اللَّهُ بِكُمُ الْيُسْرَ وَلَا
يُرِيدُ بِكُمُ الْعُسْرَ وَلِتُكْمِلُوا الْعِدَّةَ وَلِتُكَبِّرُوا
اللَّهَ عَلَىٰ مَا هَدَاكُمْ وَلَعَلَّكُمْ تَشْكُرُونَ ﴿١٨٥﴾

रमजान महिना, तो आहे ज्यांत कुरआन अवतरीत केले[७] गेले; जे लोकांना मार्गदर्शन करणारे आहे. आणि ज्याच्यात मार्गदर्शन आणि सत्य व असत्य परखण्यासाठी निशाण्या आहेत. तुमच्यात जो मनुष्य या महिन्याला पावेल, त्याला उपवास ठेवावयास पाहिजे. हां! जो आजारी असेल, किंवा प्रवासी असेल त्याने दुसऱ्या दिवसांत ही गणती पूर्ण केली पाहिजे. अल्लाहतआलाचा तुमच्याबरोबर आसानी करण्याचा इरादा आहे, सख्ती करण्याचा नाही. तो हे इच्छितो की, तुम्ही गणती पुरी करून घ्यावी. आणि अल्लाहतआलाने दिलेल्या मार्गदर्शनावर त्याच्या श्रेष्ठत्वाचे वर्णन करा. आणि त्याचे आभार माना (१८५)

وَإِذَا سَأَلَكَ عِبَادِي عَنِّي فَإِنِّي قَرِيبٌ ۖ أُجِيبُ دَعْوَةَ
الدَّاعِ إِذَا دَعَانِ ۖ فَلْيَسْتَجِيبُوا لِي وَلْيُؤْمِنُوا بِي
لَعَلَّهُمْ يَرْشُدُونَ ﴿١٨٦﴾

जेव्हा माझे बंदे (भक्त) माझ्याबद्दल आपल्याला विचारतील, तर आपण सांगून टाका की, मी फारच जवळ आहे. जेव्हा कधी कोणी माझी प्रार्थना करील; तेव्हा मी प्रार्थना करणाऱ्याची प्रार्थना मान्यही करून घेतो[८]; म्हणून लोकांनाही पाहिजे की, त्यांनी माझ्या गोष्टीलाही कबूल करीत जावे. आणि माझ्यावर विश्वास ठेवावा. हेच त्यांच्यासाठी भले आहे. (१८६)

१) मृत्यूपत्र करण्याचा हा आदेश वारसदारांच्या बाबतीत महावाक्य अवतरीत होण्यापूर्वी दिला गेला होता. आता तो रद्द (मन्सुख) करण्यांत आला आहे. नबी ﷺ चा आदेश आहे, ''अल्लाहतआलाने प्रत्येक हक्क घेणाऱ्याला त्याचा हक्क दिला आहे'' (म्हणजे वारसदारांचे हिस्से ठरवून दिले आहे.) (सुनन तिरमिझी इब्ने माजाच्या हवाल्याने) म्हणजे आता कुठल्याही वारसदारांसाठी मृत्यूपत्र करणे योग्य नाही. तथापि अशा नातेवाईकांसाठी मृत्यूपत्र केले जाऊ शकते, जे वारस नसतील किंवा भलाईच्या मार्गांत खर्च करण्यासाठी मृत्यू पत्र केले जाऊ शकते. आणि याची जास्तीत जास्त मर्यादा एक तृतीयांश संपत्ती आहे. याच्यापेक्षा जास्तीचे मृत्यूपत्र करता येऊ शकत नाही. (सहीह बुखारी)

२) 'जनफन' (एकीकडे झुकणे) चा अर्थ आहे, चुकीने किंवा विसराळूपणामुळे कोण्या एक नातेवाईकाकडे जास्त झुकून दुसऱ्यांचा हक्क मारला जावा. आणि 'इस्मन' ने अभिप्रेत आहे, जाणून बुझून असे करणे (अयसरूत्तफासीर)

किंवा 'इस्मन' ने अभिप्रेत पापाचे मृत्यूपत्र आहे, ज्याचे बदलणे आणि त्यांवर अंमलबजावणी न करणे जरूरी आहे. यावरून ठाऊक झाले की, मृत्यूपत्रात न्याय व इन्साफचा बंदोबस्त करणे जरूरी आहे; नाही तर या जगांतून जाता जाता जुलूम होणे, त्याच्या परलोकांतील मुक्तीच्या दृष्टीकोनातून फारच खतरनाक आहे.

३) 'सियाम' ज्याचा धर्मशास्त्राप्रमाणे अर्थ आहे, उष:काळापासून सूर्यास्त होईपर्यंत खाणे,पिणे आणि पत्नीशी संभोग करण्यापासून अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी थांबून जाणे. ही उपासना अंत:करणाच्या पवित्रता आणि शुद्धतेसाठी फार महत्त्वाची आहे; म्हणून तुमच्या पूर्वींच्या समूहांवरपण अनिवार्य केली गेली होती. याचा सर्वांत मोठा उद्देश ईशभय (तकवा) ची प्राप्ती आहे. आणि तकवा (ईशभय) माणसाच्या चारित्र्य आणि कर्तृत्वाला सुधारण्याचे मुलभूत कार्य करतो.

४) ही आजाऱ्याला आणि प्रवाशाला सूट देण्यात आली आहे. तो आजारपण आणि प्रवासाच्या कारणाने रमजानुल मुबारकचे जितके उपवास ठेवू शकणार नाही, तो नंतर ठेवून गणती पुरी करून घेईल.

५) 'युतीकूनहू' चे भाषांतर ''अत्यंत मुश्कीलीने उपवास ठेवू शकतील'' केले गेले आहे. (हे ह.इब्ने अब्बास ﷺ कडून आहे. इमाम बुखारीने पण त्याला पसंती दिली आहे.) म्हणजे जो माणूस अति वृद्धत्वामुळे किंवा अशा आजाराने ज्यांत बरी होण्याची आशा नसेल, उपवास ठेवण्यात कठीणाई वाटत असेल, तो एका गरीबाला जेवण फिदिया (मुआवेजा) म्हणून देऊन देईल. परंतु बहुतेक भाष्यकारांनी याचे भाषांतर ''सामर्थ्य बाळगत आहे'' असाच केला आहे. ज्याचा अर्थ असा आहे की, सुरवातीच्या इस्लामच्या काळांत, उपवास ठेवण्याची सवय नसल्यामुळे सामर्थ्य असणाऱ्यांना देखील सूट देण्यात आली होती की, जर उपवास ठेवला नाही, तर त्याच्या बदल्यात एका गरीबाला जेवण देऊन टाकावे. परंतु नंतर, 'फमन् शहिदा मिन्कुमुश्शहर फलयसुमहु'' ने याला रद्द करून, प्रत्येक सामर्थ्य ठेवणाऱ्यांसाठी उपवास अनिवार्य करून देण्यात आला. तथापि जास्त वयोवृद्ध आणि कायमच्या रूग्णांसाठी आतासुद्धा हाच आदेश आहे की, अशा लोकांनी फिदिया देऊन टाकावा; आणि गर्भवती आणि दूध पाजणाऱ्या स्त्रिया, जर उपवास ठेवण्यात कठिणता अनुभवतील तर त्या आजाऱ्याच्या आदेशांत येतील. म्हणजे त्यांनी उपवास ठेवू नये आणि नंतर उपवासाची कजा करावी. (तोफुतुल अहवीजी, शरह तिर्मिझी)

६) जो राजीखुषीने एका गरीबाला जेवण देण्याऐवजी दोन ते तीन गरीबांना जेऊ घालील, तर त्याच्यासाठी उत्तम आहे.

७) रमजानमध्ये कुरआन अवतरीत होण्याचा हा अर्थ नाही की, संपूर्ण कुरआन कुण्या एका रमजानमध्ये अवतरीत झाले; परंतु असे की, रमजानच्या शबे कद्रमध्ये लौहे महेफूजमधून या जगाच्या आकाशावर उतारण्यात आले आणि तेथे ''बैतुल इज़्ज़त''मध्ये ठेवण्यात आले. तेथून परिस्थितीनुसार तेवीस वर्षे पर्यंत अवतरीत होत राहिले (इब्ने कसीर) याकरीता हे म्हणणे की, कुरआन रमजानमध्ये किंवा 'लय्लतुल कद्र' किंवा 'लयलतुल मुबारिका' मध्ये अवतरीत झाले. हे सर्व बरोबर आहे. कारण 'लौहे महेफूज' मधून रमजान मध्येच अवतरीत झाले आहे. आणि 'लयलतूल कद्र' व 'लयलतुल मुबारिका' ही एकच रात्र आहे. म्हणजे 'कद्र' ची रात्र जी रमजानमध्येच येते. काहींजवळ याचा ध्वन्यर्थ (मफहूम) हा आहे की रमजानमध्ये कुरआनाच्या अवतरण्याची सुरवात झाली. आणि पहिले 'वह्य' जे 'गारे हिरा' मध्ये आले, ते रमजानमध्ये आले. या अनुषंगाने कुरआन मजीद आणि रमजानुल मुबारक यांचा आपसांत फारच गहिरा संबंध आहे. याच कारणाने नबी करीम ﷺ या मुबारक महिन्यांत ह.जिब्रईल عليه السلام कडून कुरआनाचा दौर (पठण) करीत असत. आणि ज्या वर्षी आपला मृत्यू झाला नबी करीम ﷺ नी जिब्रईल عليه السلام बरोबर रमजान मध्ये दोन वेळा दौर (पठण) केला. रमजानच्या तीन रात्री (२३,२५ आणि २७) आपण ﷺ नी सहाबांना बाजमाअत 'कयामुललैल' पण करवून घेतला. ज्याला आता 'तरावीह' म्हणण्यात येते. (सहीह तिर्मिजी, स.इब्ने माजा, अल्बानी) ही तरावीह आठ रकात आणि वितरसह अकरा रकात होती. ज्याचा खुलासा ह.जाबीर ﷺ ची रिवायत आहे. (जी कयामुललैल मरवजी वगैरे मध्ये आहे.) आणि आयेशा ﷺ ची रिवायत (सहीह बुखारी किताबुत्तहाज्जूद. बाब नं.५, बाब नं.१६) मध्ये मौजुद आहे. नबी ﷺ चे २० रकात तरावीह पढणे कुठल्याही सहीह हदीसप्रमाणे सिद्ध नाही.

८) रमजानुल मुबारकच्या अहकाम आणि मसाईलमध्ये दुआच्या मसल्याचे वर्णन करून, हे स्पष्ट करून दिले की, रमजानमध्ये दुआ (मागण्या) चे मोठे महत्त्व आहे. ज्याची खूप नियमितपणे अंमलबजावणी (एहतमाम) केली पाहिजे. विशेषत: उपवास सोडण्याच्यावेळी दुआ कबूल होण्याचा विशेष समय दाखविण्यात आला आहे. (मुसनद अहमद, तिर्मिजी, निसाई इब्ने माजा.) तथापि दुआ कबूल होण्यासाठी त्या शर्ती आणि अटींचे पालन केले जावे; ज्या कुरआन आणि हदीसमध्ये वर्णन करण्यात आल्या आहेत. ज्याच्यातून दोन येथे वर्णन करण्यात आल्या आहेत. एक अल्लाहवर खऱ्या अर्थाने ईमान (विश्वास) आणि दुसरा अल्लाहतआलाची ताबेदारी आणि आज्ञापालन. याचप्रमाणे अहादीसमध्ये हराम अन्नापासून वाचण्याची व नम्रता, व्याकुळता दाखविण्याची ताकीद करण्यात आली आहे.

أُحِلَّ لَكُمْ لَيْلَةَ الصِّيَامِ الرَّفَثُ إِلٰى نِسَآئِكُمْ ؕ
هُنَّ لِبَاسٌ لَّكُمْ وَاَنْتُمْ لِبَاسٌ لَّهُنَّ ؕ عَلِمَ اللّٰهُ اَنَّكُمْ
كُنْتُمْ تَخْتَانُوْنَ اَنْفُسَكُمْ فَتَابَ عَلَيْكُمْ وَعَفَا عَنْكُمْ ۚ
فَالْـٰٔنَ بَاشِرُوْهُنَّ وَابْتَغُوْا مَا كَتَبَ اللّٰهُ لَكُمْ ۠
وَكُلُوْا وَاشْرَبُوْا حَتّٰى يَتَبَيَّنَ لَكُمُ الْخَيْطُ الْاَبْيَضُ
مِنَ الْخَيْطِ الْاَسْوَدِ مِنَ الْفَجْرِ ۠ ثُمَّ اَتِمُّوا الصِّيَامَ
اِلَى الَّيْلِ ۚ وَلَا تُبَاشِرُوْهُنَّ وَاَنْتُمْ عٰكِفُوْنَ ۙ فِى
الْمَسٰجِدِ ؕ تِلْكَ حُدُوْدُ اللّٰهِ فَلَا تَقْرَبُوْهَا ؕ كَذٰلِكَ
يُبَيِّنُ اللّٰهُ اٰيٰتِهٖ لِلنَّاسِ لَعَلَّهُمْ يَتَّقُوْنَ ﴿١٨٧﴾

उपवासांच्या रात्रीत आपल्या पत्नींना भेटणे, तुमच्यासाठी हलाल (विहीत) करण्यात आले आहे. त्या तुमचा पोषाख आहेत; आणि तुम्ही त्यांचा पोषाख आहात. तुमच्या छुप्या दगाबाजीचे अल्लाहतआलाला ज्ञान आहे. त्याने तुमचा पश्चात्ताप मान्य करून तुम्हाला माफ केले. आता तुम्हास त्यांच्याबरोबर संभोगाची आणि अल्लाहतआलाने लिहिलेल्या वस्तूचा शोध घेण्याची परवानगी आहे. तुम्ही खात पित रहा. येथपावेतो की, उष:कालचा पांढरा दोरा, काळ्या दोऱ्यातून दिसू लागेल[१]. मग रात्रींपर्यंत उपवासाला पूर्ण करा[२]. आणि स्त्रियांपाशी त्यावेळी संभोग करू नका. जेव्हा मशींदीमधून 'एतेकाफ' मध्ये असाल[३], या अल्लाहच्या बांधीव मर्यादा आहेत. तुम्ही त्यांच्या जवळही फिरकू नका. अशा प्रकारे अल्लाहतआला आपली महावाक्ये लोकांसाठी वर्णन करीतो की, त्यांनी (अल्लाहच्या आज्ञाभंजनापासून) वाचावे (१८७)

٢٣ ع ٦ ٧

وَلَا تَاْكُلُوْٓا اَمْوَالَكُمْ بَيْنَكُمْ بِالْبَاطِلِ وَتُدْلُوْا بِهَآ اِلَى
الْحُكَّامِ لِتَاْكُلُوْا فَرِيْقًا مِّنْ اَمْوَالِ النَّاسِ بِالْاِثْمِ
وَاَنْتُمْ تَعْلَمُوْنَ ﴿١٨٨﴾ ۧ

आणि एक दुसऱ्याचा माल नाहक खात जाऊ नका. तसेच अधिकाऱ्यांना लांच पोहचवून कोणाचा काही माल जुलूम अत्याचाराने हडप करू नका. वास्तविक तुम्ही जाणत आहात[४]. (१८८)

يَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الْاَهِلَّةِ ؕ قُلْ هِىَ مَوَاقِيْتُ لِلنَّاسِ
وَالْحَجِّ ؕ وَلَيْسَ الْبِرُّ بِاَنْ تَاْتُوا الْبُيُوْتَ مِنْ ظُهُوْرِهَا
وَلٰكِنَّ الْبِرَّ مَنِ اتَّقٰى ۚ وَاْتُوا الْبُيُوْتَ مِنْ اَبْوَابِهَا ۠
وَاتَّقُوا اللّٰهَ لَعَلَّكُمْ تُفْلِحُوْنَ ﴿١٨٩﴾

लोक आपल्याला चंद्राविषयी प्रश्न करतात; आपण सांगून टाका की, हे लोकांच्या (उपासनेच्या) वेळा आणि हजच्या हंगामासाठी आहे. (एहराम परिधान केलेल्या अवस्थेत) आणि घरांच्या मागच्या बाजूने तुमचे येणे काही पुण्य नाही. परंतु पुण्यवान तो आहे जो अल्लाहचे भय बाळगणारा असेल. आणि घरांमध्ये तर दरवाज्यातून येत चला[५]. आणि अल्लाहला भीत रहा की, तुम्ही सफल होऊन जाल (१८९)

وَقَاتِلُوْا فِىْ سَبِيْلِ اللّٰهِ الَّذِيْنَ يُقَاتِلُوْنَكُمْ وَلَا
تَعْتَدُوْا ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يُحِبُّ الْمُعْتَدِيْنَ ﴿١٩٠﴾

त्या लोकांशी अल्लाहच्या मार्गात युद्ध करा, जे तुमच्याशी युद्ध करतील, आणि अत्याचार[६] (जियादती) करू नका. अल्लाहतआला अत्याचार करणाऱ्यांना पसंत करीत नाही. (१९०)

وَاقْتُلُوْهُمْ حَيْثُ ثَقِفْتُمُوْهُمْ وَاَخْرِجُوْهُمْ مِّنْ حَيْثُ
اَخْرَجُوْكُمْ وَالْفِتْنَةُ اَشَدُّ مِنَ الْقَتْلِ ۚ وَلَا تُقٰتِلُوْهُمْ
عِنْدَ الْمَسْجِدِ الْحَرَامِ حَتّٰى يُقٰتِلُوْكُمْ فِيْهِ ۚ فَاِنْ قٰتَلُوْكُمْ
فَاقْتُلُوْهُمْ ؕ كَذٰلِكَ جَزَآءُ الْكٰفِرِيْنَ ﴿١٩١﴾

त्यांना (ठार) मारा, जेथे कोठे (त्यांना) पावाल, आणि त्यांना (बाहेर) काढा, जेथून त्यांनी तुम्हाला काढले आहे. आणि (ऐका) फसाद खुनापेक्षा जास्त वाईट आहे[७]. आणि मस्जिद हरामजवळ त्यांच्याशी युद्ध करू नका; जोपर्यंत हे स्वत: तुमच्याशी लढणार नाही. जर हे तुमच्याशी लढतील, तर तुम्ही पण त्यांना मारा[८]. काफिरांचा हाच बदला आहे (१९१)

فَاِنِ انْتَهَوْا فَاِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿١٩٢﴾

जर ते (पश्चात्ताप करतील) बाज येतील तर अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१९२)

وَقٰتِلُوْهُمْ حَتّٰى لَا تَكُوْنَ فِتْنَةٌ وَّيَكُوْنَ الدِّيْنُ
لِلّٰهِ ؕ فَاِنِ انْتَهَوْا فَلَا عُدْوَانَ اِلَّا عَلَى الظّٰلِمِيْنَ ﴿١٩٣﴾

यांच्याशी लढा, जोपर्यंत फितना फसाद संपून जात नाही आणि अल्लाहतआलाचा धर्म (हुकूम) चालेल. जर हे थांबून जातील (तर तुम्हीही थांबून जा) पकड तर फक्त जालिमांचीच आहे. (१९३)

१) सुरवातीच्या इस्लाममध्ये एक आदेश असा होता की, उपवास सोडल्यानंतर ईशाची नमाज किंवा झोपण्यापूर्वी खाण्यापिण्याला आणि पत्नीशी संभोग करण्याला परवानगी होती; झोपल्यानंतर यापैकी कुठलेही काम केले जाऊ शकत नव्हते. स्पष्ट आहे की, ही बंदी फारच कडक होती; आणि यावर अंमलबजावणी करणे फारच कठीण होते. अल्लाहतआलाने या महावाक्यांत हे दोन्ही निर्बंध काढून टाकले आणि उपवास सोडल्यापासून उष:काल पर्यंत खाण्यापिण्याला आणि पत्नीशी संभोग करण्याला परवानगी देऊन टाकली. 'रफस' ने अभिप्रेत पत्नीशी संभोग आहे. ''अल्खय्तुल अबयजु'' ने अभिप्रेत उष:काल, 'अलखयतुल असवद' (काळी धारा) ने अभिप्रेत रात्र आहे. (इब्ने कसीर)

**मसला** : यावरून हे ही ठाऊक झाले की, जनाबतच्या (संभोग केल्यानंतरच्या) अवस्थेत उपवास ठेवला जाऊ शकतो. कारण की, सकाळपर्यंत अल्लाहतआलाने उल्लेखित कामाची परवानगी दिलेली आहे. आणि स.बुखारी व.स.मुस्लीमच्या रिवायतनुसार याची पुष्टी होते. (इब्ने कसीर)

२) म्हणजे रात्र होताच (सूर्यास्तानंतर तात्काळ) उपवास सोडून घ्या. उशीर करू नका. जशी हदीसमध्ये सुद्धा उपवास लवकर सोडण्याची ताकीद आणि त्याचे महत्त्व आलेले आहे. दुसरे असे विसाल करूं नका. विसालचा अर्थ असा की, एक उपवास सोडल्याशिवाय दुसरा उपवास ठेवून घेणे. याला नबी ﷺ नी फारच कडक भाषेत मना केले आहे. (कुतुबे हदीस)

३) एतेकाफच्या अवस्थेत पत्नीशी संभोग,चुंबन व अलिंगनची परवानगी नाही.परंतु भेटणे व बात करणे जायज आहे. 'आकिफूना फिल मसाजीद' ने जाहीर होते की, एतेकाफ करण्यासाठी मशीद जरूरी आहे, मग तो पुरूष असो अथवा स्त्री. पवित्र पत्न्यांनीसुद्धा मशिदीत एतेकाफ केलेला आहे. यासाठी स्त्रियांचे आपल्या घरांमध्ये एतेकाफमध्ये बसणे बरोबर नाही. तथापि मशिदीमध्ये त्यांच्यासाठी प्रत्येक गोष्टींची पुरूषांपेक्षा वेगळी व्यवस्था करणे जरूरीचे आहे. कारण की, पुरूषांशी कुठल्याही प्रकारचा संबंध (इखतलात) येऊ नये. जोपर्यंत मशिदीमध्ये संपूर्ण सुरक्षित आणि पुरूषांपासून अगदी वेगळी व्यवस्था नसेल, तर स्त्रियांना मशिदीमध्ये एतेकाफमध्ये बसण्याची परवानगी दिली जाऊ नये आणि स्त्रियांनीपण यासाठी आग्रह धरता कामा नये. ही एक नफील इबादत (उपासना) आहे. जोपर्यंत पूर्ण व्यवस्था होणार नाही, या नफील इबादतपासून वेगळे रहाणेच चांगले आहे. फिकाचे तत्त्व आहे, ''भलाईच्या प्राप्तीच्या मुकाबल्यात फितन्यापासून वाचणे आणि त्यांना टाळणे जास्त उत्तम आहे.''

४) हे अशा व्यक्तीच्या बाबतीत आहे; जिच्यावर कोणाचा हक्क आहे, परंतु हक्कवाल्याजवळ काही पुरावा नसेल, तर या कमतरतेचा फायदा घेऊन तो न्यायालयांत किंवा संबंधीत अधिकाऱ्यांकडून आपल्या बाजूने निर्णय करून घेईल; आणि अशाप्रकारे दुसऱ्याचा हक्क मारेल, हा जुलूम आहे आणि असे कृत्य करणे हराम आहे. न्यायालयाचा निर्णय जुलूमाला आणि हरामखोरीला योग्य आणि विहीत (हलाल) करू शकत नाही. हा जालिम अल्लाहजवळ गुन्हेगार होईल. (इब्ने कसीर)

५) अन्सार लोक, अज्ञान काळांत जेव्हा हज किंवा उमराचा एहराम बांधत आणि मग जेव्हा खास कामासाठी घरी येण्याची जरूरी होत असे, तर दरवाज्याने येण्याचे ऐवजी मागची भिंत ओलांडून आत येत. याला ते पुण्य समजत. अल्लाहतआलाने म्हटले हे पुण्य नाही. (अयसरू त्तफासीर)

६) या महावाक्यात पहिल्यांदा त्या लोकांबरोबर युद्ध करण्याची परवानगी देण्यांत आली, जे मुसलमानांशी युद्ध करण्यांस उत्सुक असत. तथापि अत्याचार करण्याला मना करण्यात आले. ज्याचा अर्थ 'मुसलह्' (तुकडे तुकडे करू नका) स्त्रिया मुले आणि वृद्धांना ठार करू नका; ज्यांचा युद्धांत सहभाग नसेल. त्याचप्रमाणे वृक्ष वगैरे जाळून टाकणे, किंवा जनावरांना काही कारणाशिवाय ठार करणे पण अत्याचार आहे. ज्याच्यापासून स्वत:ला वाचविले पाहिजे. (इब्ने कसीर)

७) मक्केमध्ये मुसलमान कमजोर आणि विखुरलेले होते म्हणून लढाई मना होती. हिजरतनंतर मुसलमानांची सारी शक्ती मदिनेमध्ये एकवटली; तेव्हा त्यांना जिहादची परवानगी देण्यात आली. सुरवातीला आपण ﷺ फक्त त्यांच्याशीच लढत, जे मुसलमानांशी लढण्याची पहल करीत, याच्यानंतर यांच्यात आणखी विस्तार करण्यांत आला. आणि मुसलमानांनी आवश्यकतेनुसार काफिरांच्या इलाख्यात जाऊनसुद्धा जिहाद केले. कुरआन करीमने 'एअ्तदाअ' (अत्याचार करण्याला) मना केले. याकरीता नबी करीम ﷺ नी आपल्या लष्कराला ताकीद केली की, माले गनीमतमध्ये खयानत, वचनभंग आणि कान नाक आणि इतर अवयव कापू नये. तसेच मुलांना, स्त्रियांना आणि गिरजाघरात (चर्चमध्ये) जे उपासनेत गर्क आहेत, अशा काफिरांना ठार मारू नये. याचप्रमाणे वृक्षांचे जाळणे आणि जनावरांना कुठल्याही उद्देशाशिवाय मारण्यालाही मना करत असत. (इब्ने कसीर स.मुस्लीमच्या हवाल्याने) जेथे कोठे पावालचा अर्थ आहे, त्यांना ठार करण्याचे सामर्थ्य तुम्हांस प्राप्त होऊन जाईल. (अयसरूत्तफासीर) 'मिन हयसू अखरजूकुम' म्हणजे ज्याप्रमाणे काफिरांनी तुम्हास मक्केतून बाहेर काढले होते, त्याप्रमाणे तुम्हीसुद्धा, त्यांना मक्केच्या बाहेर काढून द्या. म्हणून मक्केच्या विजयानंतर जे लोक मुसलमान झाले नाहीत त्यांना कराराची मुद्दत संपल्यानंतर तेथून निघून जाण्याचा आदेश देण्यात आला. 'फितना' ने अभिप्रेत कुफ्र आणि शिर्क आहे. हे खुनापेक्षाही जास्त वाईट आहे. म्हणून याला संपविण्यासाठी जिहाद पासून हयगय (गुरेज) न केली पाहिजे.

८) हरमच्या हद्दीत युद्ध (किताल) मना आहे. पण जर काफिर लोक याच्या प्रतिष्ठेचा विचार जर करणार नाही, आणि तुमच्याशी लढतील, तर तुम्हाला पण त्यांच्याशी लढण्याची परवानगी आहे.

اَلشَّهۡرُ الۡحَرَامُ بِالشَّهۡرِ الۡحَرَامِ وَالۡحُرُمٰتُ قِصَاصٌ ؕ فَمَنِ اعۡتَدٰى عَلَيۡكُمۡ فَاعۡتَدُوۡا عَلَيۡهِ بِمِثۡلِ مَا اعۡتَدٰى عَلَيۡكُمۡ ۖ وَاتَّقُوا اللّٰهَ وَاعۡلَمُوۡۤا اَنَّ اللّٰهَ مَعَ الۡمُتَّقِيۡنَ ﴿١٩٤﴾

**आदर सन्मानाचे महिने आदर सन्मानाच्या महिन्याच्या बदल्यात आहे; आणि आदराच्या सर्व चिजा बदल्याचा बदला आहेत[१]. जो तुमच्यावर अत्याचार करेल, तुम्हीपण त्याचा इतका बदला घ्या जितका त्याने तुमच्यावर केला असेल; आणि अल्लाहतआलाला भीत रहा. आणि लक्षांत असू द्या की, अल्लाहतआला त्याला भिणाऱ्यांबरोबर आहे. (१९४)**

وَاَنۡفِقُوۡا فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ وَلَا تُلۡقُوۡا بِاَيۡدِيۡكُمۡ اِلَى التَّهۡلُكَةِ ۛۚ وَاَحۡسِنُوۡا ۛۚ اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الۡمُحۡسِنِيۡنَ ﴿١٩٥﴾

**अल्लाहतआलाच्या मार्गात खर्च करा. आणि आपल्या हातांनी (आपल्याला) हलाखीत टाकू नका[२]. आणि परोपकार करा, अल्लाहतआला परोपकार करणाऱ्यांना दोस्त राखतो (१९५)**

وَاَتِمُّوا الۡحَجَّ وَالۡعُمۡرَةَ لِلّٰهِ ؕ فَاِنۡ اُحۡصِرۡتُمۡ فَمَا اسۡتَيۡسَرَ مِنَ الۡهَدۡىِ ۚ وَلَا تَحۡلِقُوۡا رُءُوۡسَكُمۡ حَتّٰى يَبۡلُغَ الۡهَدۡىُ مَحِلَّهٗ ؕ فَمَنۡ كَانَ مِنۡكُمۡ مَّرِيۡضًا اَوۡ بِهٖۤ اَذًى مِّنۡ رَّاۡسِهٖ فَفِدۡيَةٌ مِّنۡ صِيَامٍ اَوۡ صَدَقَةٍ اَوۡ نُسُكٍ ۚ فَاِذَاۤ اَمِنۡتُمۡ ۛ فَمَنۡ تَمَتَّعَ بِالۡعُمۡرَةِ اِلَى الۡحَجِّ فَمَا اسۡتَيۡسَرَ مِنَ الۡهَدۡىِ ۚ فَمَنۡ لَّمۡ يَجِدۡ فَصِيَامُ ثَلٰثَةِ اَيَّامٍ فِى الۡحَجِّ وَسَبۡعَةٍ اِذَا رَجَعۡتُمۡ ؕ تِلۡكَ عَشَرَةٌ كَامِلَةٌ ؕ ذٰلِكَ لِمَنۡ لَّمۡ يَكُنۡ اَهۡلُهٗ حَاضِرِى الۡمَسۡجِدِ الۡحَرَامِ ؕ وَاتَّقُوا اللّٰهَ وَاعۡلَمُوۡۤا اَنَّ اللّٰهَ شَدِيۡدُ الۡعِقَابِ ﴿١٩٦﴾

**हज आणि उमरा अल्लाहतआलासाठी पूर्ण करा[३]. हां! जर तुम्ही रोकले गेले, तर जी कुरबानी (तुम्हांस) प्राप्त होईल, ती करून टाका[४] आणि आपली डोकी मुंडवू नका. जोपर्यंत कुरबानी कुरबानी करण्याच्या जागेवर पोहचून जाणार नाही[५]. तथापि तुमच्यापैकी जो आजारी असेल किंवा त्याच्या डोक्यात काही त्रास असेल, त्याच्यावर फिदीया आहे. पाहिजे तर उपवास ठेवून घ्यावे किंवा दानधर्म करून टाकावा, किंवा कुरबानी करून टाकावी[६], मग जेव्हा तुम्ही समाधानकारक स्थितीत होऊन जाल, तर जो मनुष्य उमऱ्या पासून हजपर्यंत तमत्तोअ करेन, त्याला जी कुरबानी प्राप्त होईल, तिला करून टाकावी. ज्याला (कुरबानी करण्याची) ताकद नसेल, तो तीन उपवास तर हजच्या दिवसांत ठेवून घेईल, आणि सात परत आल्यावर[७] हे पूर्ण दहा झाले. हा आदेश त्यांच्यासाठी आहे, जे मस्जिदे हरामचे रहाणारे नसावे[८]. लोकांनो! अल्लाहला भित रहा. आणि लक्षात ठेवा की, अल्लाहतआला कडक शिक्षा करणारा आहे. (१९६)**

اَلۡحَجُّ اَشۡهُرٌ مَّعۡلُوۡمٰتٌ ۚ فَمَنۡ فَرَضَ فِيۡهِنَّ الۡحَجَّ فَلَا رَفَثَ وَلَا فُسُوۡقَ ۙ وَلَا جِدَالَ فِى الۡحَجِّ ؕ وَمَا تَفۡعَلُوۡا مِنۡ خَيۡرٍ يَّعۡلَمۡهُ اللّٰهُ ؕ وَتَزَوَّدُوۡا فَاِنَّ خَيۡرَ الزَّادِ التَّقۡوٰى وَاتَّقُوۡنِ يٰۤاُولِى الۡاَلۡبَابِ ﴿١٩٧﴾

**हजचे महिने ठरलेले आहेत[९]. यासाठी जो मनुष्य यांच्यात हज करण्याचे ठरवेल, तो आपल्या पत्नीशी मेळमिलाप करण्याला, गुनाह करण्याला, लढाई झगडा करण्यापासून (त्याने स्वत:ला) वाचवत रहावे[१०]. तुम्ही जे काही पुण्य कराल, त्याला अल्लाहतआला जाणून आहे. आणि आपल्या बरोबर प्रवास खर्च घेत चला. सर्वांत श्रेष्ठ तर अल्लाहतआलाचे भय आहे[११]. आणि हे बुद्धीमानांनो! मलाच भीत रहा. (१९७)**

१) सहा हिजरीमध्ये रसूल ﷺ चौदाशे सहाबांना बरोबर घेऊन उमरा करण्यासाठी गेले होते; परंतु मक्केच्या काफिरांनी त्यांना मक्केला जाऊ दिले नाही. आणि असे ठरले की, येत्यावर्षी मुसलमान तीन दिवसासाठी उमरा करण्यासाठी, मक्केला येतील. हा जिलकादाचा महिना होता. जो आदरणीय महिन्यांपैकी एक आहे. जेव्हा दुसऱ्या वर्षी मुसलमान झालेल्या कराराप्रमाणे याच महिन्यांत उमरा करण्यासाठी जाऊ लागले, तेव्हा अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत केले. याचा अर्थ असा की, यावेळी सुद्धा कुफ्फारे मक्का, या आदरणीय महिन्याची प्रतिष्ठा पायदळी तुडवून गेल्या वर्षाप्रमाणे तुम्हांस मक्केमध्ये जाण्यापासून रोकतील, तर तुम्ही सुद्धा या महिन्याच्या प्रतिष्ठेला दृष्टीआड करून त्यांच्याशी भरपूर मुकाबला करा. हुरमतचा विचार करण्यात बदला आहे. म्हणजे ते हुरमतचा विचार करतील, तर तुम्हीपण हुरमतचा विचार करा. दुसऱ्या परिस्थितीत तुम्ही सुद्धा हुरमतला दृष्टीआड करून काफिरांना भय निर्माण करणारा धडा शिकवा. (इब्ने कसीर)

२) याच्याने काही लोकांनी अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याला रद्द तर काही लोकांनी जिहादला रद्द तर काहींनी गुन्हयावर गुन्हे करणे, असा अर्थ घेतला आहे. आणि हे सर्व प्रकार तबाही आणि बरबादीचे आहेत. जिहाद करणे सोडून द्याल, किंवा जिहादमध्ये आपला माल खर्च करण्यापासून पळ काढले, तर खचितच शत्रू प्रबळ होईल, आणि तुम्ही दुर्बल. परिणाम बरबादी आहे.

३) म्हणजे हज किंवा उमऱ्यांचा एहराम बांधून घेतला; तर त्याचे पुरे करणे जरूरी आहे. मग तो हज किंवा उमरा नफील काअसेना! (अयसरूत्तफासीर)

४) जर रस्त्यांत शत्रू किंवा तिव्र आजारामुळे अडथळा निर्माण होईल. तर एक जनावर (हदी) बकरी, गाय किंवा उंट जे ही प्राप्त होईल, तेथेच जबह करून डोक्याचे मुंडन करून घ्या. आणि हलाल होऊन जा. जसे नबी ﷺ आणि त्यांच्या सहाबांनी तेथेच हुदैबियामध्ये, कुरबान्या जबह केल्या होत्या. आणि हुदैबिया हरमच्या बाहेर आहे. (फत्हुल कदीर) आणि येत्या वर्षी त्याची कजा द्या; जशी नबी ﷺ नी ६ हिजरी व उमऱ्यांची कजा ७ हिजरीमध्ये दिली.
५) याचा संबंध शांती काळाच्या अवस्थेशी आहे. म्हणजे शांतीच्या स्थितीत त्यावेळेपर्यंत डोक्यांचे मुंडन करू नका (एहराम सोडून हलाल होऊ नका.) जो पर्यंत तुमचे सर्व मनासिके हज पूर्ण न करून घ्याल.
६) म्हणजे त्याला असा त्रास होत असेल की, त्याला डोक्याच्या केसांचे मुंडन करणे भाग पडेल, तर याचा फिदीया देणे जरूरी आहे. हदीसप्रमाणे असा माणूस सहा गरीबांना जेवण देऊन देईल किंवा एक बकरी जबह करेन; किंवा तीन दिवसाचे उपवास ठेवेल. उपवासाशिवाय पहिल्या दोन फिदियाच्या जागेबाबत मतभेद आहेत. काही म्हणतात, जेवण आणि रक्त (बकरी जबह करणे) मक्केमध्येच देऊन टाकावे. काही म्हणतात की, उपवासाप्रमाणे याच्यासाठी पण काही काही विशिष्ट जागा निश्चित नाही. शौकानीने याच मताला अनुमोदन दिले आहे. (फत्हुल कदीर)
७) हजचे तीन प्रकार आहेत. १) इफराद – फक्त हजच्या नियतने एहराम बांधणे २) किरान – हज आणि उमरा दोघांची बरोबरच नियत करून एहराम बांधणे. या दोन्ही प्रकारांमध्ये सर्व मनासिके हज अदा करण्यापूर्वी एहराम सोडणे योग्य नाही. ३) हज तमत्तोअ – याच्यात पण हज आणि उमरा दोहोंची नियत होते. परंतु पहिले फक्त उमराच्या नियतने एहराम बांधला जातो; आणि उमरा केल्यानंतर पुन्हा एहराम सोडून टाकला जातो. आणि मग आठ जिलहज्जाला,हजसाठी मक्केहून दुसऱ्यांदा एहराम बांधला जातो. तमत्तोअचा अर्थ फायदा उचलण्याचा आहे. जणू मध्यंतरांत एहराम सोडून फायदा घेतला जातो. हज्जे किरान व हज्जे तमत्तोअ दोहोत एक हदीं जनावरची पण कुरबानी करावी लागते. या महावाक्यांत याच हज्जे तमत्तोअचा आदेश वर्णन करण्यात आला आहे की, 'मुतमत्तोअ' सामर्थ्यानुसार, दहा जिलहिज्जाला एका जनावराची कुरबानी करावी आणि जर कुरबानी करण्याचे सामर्थ्य नसेल; तर तीन दिवसांचे उपवास हजच्या दिवसांत आणि सात उपवास घरी जाऊन ठेवावेत. हजचे दिवस ज्यात उपवास ठेवावयचे आहेत; ९ जिलहज्जा (यौमे अरफा) च्या पूर्वी किंवा मग अय्यामे तशरीक आहेत. (फत्हुल कदीर)
८) म्हणजे तमत्तोअ आणि यामुळे दिली जाणारी हदी (कुरबानी) किंवा उपवास फक्त त्या लोकांसाठी आहेत, जे मस्जिदे हरामचे रहाणारे नसावे. याच्याने अभिप्रेत हरमच्या हद्दीत किंवा इतक्या दूर रहाणारे आहेत की, त्याच्या प्रवासावर 'कसर' लागू होत नसावी (इब्ने कसीर, इब्ने जरीरच्या हवाल्याने)
९) आणि हे शव्वाल, जिल्कादा व जिलहाज्जाचे पहिले दहा दिवस आहेत. अर्थ असा की, उमरा तर वर्षभरात केव्हाही करणे जायज आहे. परंतु हज फक्त विशिष्ट दिवसांतच होतो. यासाठी त्याचा एहराम हजच्या महिन्यांशिवाय बांधणे जाएज नाही. (इब्ने कसीर)
**मसला –** हज्जे किरान किंवा इफराद चा एहराम मक्केवाले मक्केच्या आंतच बांधतील, तथापि हज्जे तमत्तोअच्या बाबतीत उमऱ्याच्या एहरामसाठी हरमच्या बाहेर 'हिल्ल' मध्ये जाणे त्यांच्यासाठी आवश्यक आहे. (फत्हुल बारी आणि मौता इमाम मालिक) याप्रमाणे आफाकी लोक, हज्जे तमत्तोअमध्ये आठ 'जिल्हिज्जला, मक्केहूनच एहराम बांधतील. तथापि काही उल्मां(धर्मपंडितां) जवळ मक्कांवाल्यांना उमऱ्याच्या एहरामासाठी हरमच्या हद्दीपासून बाहेर जाण्याची जरूरी नाही. यासाठी ते हर प्रकारच्या हज आणि उमरासाठी आपल्या आपल्या जागेवरूनच एहराम बांधू शकतात.
**मलहुजा –** हाफीज इब्ने कय्यीमने लिहिले आहे की, रसूल ﷺ च्या कथना आणि कर्माप्रमाणे फक्त दोन प्रकारचे उमरे साबित (सिद्ध) आहेत. एक तो, जो हज्जे तमत्तोअबरोबर केला जाऊ शकतो. दुसरा तो ''उमरा मुफरेदा'' जो हजच्या दिवसांशिवाय, फक्त उमऱ्याच्या नियतनेच प्रवास करून केला जावा. नाहीतर हरमच्या बाहेर जाऊन कोण्या जवळातल्या जवळच्या, 'हिल' हून उमऱ्यांकरीता एहराम बांधून येणे शरिअतच्या विरूद्ध आहे. (ज़ादुल मआद)
**नोट –** हरमच्या हदीच्या बाहेरच्या इलाख्याला 'हिल्ल' आणि मक्केच्या बाहेरून येणाऱ्या हाजींना 'आफाकी' म्हटले जाते.
१०) सहीह बुखारी आणि मुस्लीमची हदीस आहे, ''ज्याने हज केला आणि कामेच्छाच्या गोष्टी आणि गुन्ह्यांपासून (फिसक व फुजुर) वाचला, तो गुन्ह्यांपासून असा पाक साफ होऊन जातो, जसा त्या दिवशी पाक होता, ज्या दिवशी त्याच्या आईने त्याला प्रसुत केले.''
११)ईशभयाने (तकवा) अभिप्रेत येथे, कोणापासून काही मागण्यापासून स्वत:ला वाचविणे आहे. काही लोक प्रवासखर्च घेतल्याशिवाय हजसाठी घरून निघतात आणि म्हणतात की आमचा अल्लाहवर भरोसा (तवक्कल) आहे. अल्लाहने, या भरोशाच्या पद्धतीला, चूक म्हटले आणि प्रवासखर्च घेण्याची ताकीद केली.

لَيْسَ عَلَيْكُمْ جُنَاحٌ اَنْ تَبْتَغُوْا فَضْلًا مِّنْ رَّبِّكُمْ ؕ فَاِذَآ اَفَضْتُمْ مِّنْ عَرَفٰتٍ فَاذْكُرُوا اللّٰهَ عِنْدَ الْمَشْعَرِ الْحَرَامِ ۪ وَاذْكُرُوْهُ كَمَا هَدٰىكُمْ ۚ وَاِنْ كُنْتُمْ مِّنْ قَبْلِهٖ لَمِنَ الضَّآلِّيْنَ ﴿١٩٨﴾

तुम्हावर आपल्या पालनकर्त्याची कृपा शोधण्यावर काही गुनाह नाही[१]. जेव्हा तुम्ही अरफातहून परत फिराल, तर मशअरूल हरामजवळ अल्लाहचे स्मरण करा. आणि याचा उल्लेख असा करा, की जसे त्याने तुम्हाला मार्गदर्शन (हिदायत) केले वास्तविक तुम्ही यापूर्वी आडमार्गी भटकत होता[२] (१९८)

ثُمَّ اَفِيْضُوْا مِنْ حَيْثُ اَفَاضَ النَّاسُ وَاسْتَغْفِرُوا اللّٰهَ ؕ اِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿١٩٩﴾

मग तुम्ही त्या जागेवरून परत फिरा, जेथून सर्व लोक परत फिरता[३] आणि अल्लाहतआलाजवळ माफी मागत रहा. नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे (१९९)

فَاِذَا قَضَيْتُمْ مَّنَاسِكَكُمْ فَاذْكُرُوا اللّٰهَ كَذِكْرِكُمْ اٰبَآءَكُمْ اَوْ اَشَدَّ ذِكْرًا ؕ فَمِنَ النَّاسِ مَنْ يَّقُوْلُ رَبَّنَآ اٰتِنَا فِى الدُّنْيَا وَمَا لَهٗ فِى الْاٰخِرَةِ مِنْ خَلَاقٍ ﴿٢٠٠﴾

मग जेव्हा, तुम्ही हजचे अर्कान पूर्ण करून चुकाल, तेव्हा अल्लाहतआलाचे स्मरण करा. ज्याप्रमाणे तुम्ही आपल्या वाडवडीलांचे स्मरण करीत होता; किंबहुना याच्यापेक्षा सुद्धा जास्त[४]. काही लोक असे आहेत, की जे म्हणतात, हे आमच्या पालनकर्त्या! (जे काही द्यावयाचे आहे ते या) जगांत दे. अशा लोकांचा परलोकांत काहीही वाटा नाही (२००)

وَمِنْهُمْ مَّنْ يَّقُوْلُ رَبَّنَآ اٰتِنَا فِى الدُّنْيَا حَسَنَةً وَّفِى الْاٰخِرَةِ حَسَنَةً وَّقِنَا عَذَابَ النَّارِ ﴿٢٠١﴾

आणि काही लोक ते पण आहेत, ते म्हणतात हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला (या) जगात नेकी[५] दे; आणि परलोकात सुद्धा भलाई अता कर, आणि आम्हाला नरकाग्नीच्या शिक्षेपासून वाचव (२०१)

اُولٰٓئِكَ لَهُمْ نَصِيْبٌ مِّمَّا كَسَبُوْا ؕ وَاللّٰهُ سَرِيْعُ الْحِسَابِ ﴿٢٠٢﴾

النصف

हे ते लोक आहेत, ज्यांच्यासाठी (त्यांच्या) कर्माचा वाटा आहे आणि अल्लाहतआला लवकरच हिशेब घेणारा आहे (२०२)

وَاذْكُرُوا اللّٰهَ فِىْٓ اَيَّامٍ مَّعْدُوْدٰتٍ ؕ فَمَنْ تَعَجَّلَ فِىْ يَوْمَيْنِ فَلَآ اِثْمَ عَلَيْهِ ۚ وَمَنْ تَاَخَّرَ فَلَآ اِثْمَ عَلَيْهِ ۙ لِمَنِ اتَّقٰى ؕ وَاتَّقُوا اللّٰهَ وَاعْلَمُوْٓا اَنَّكُمْ اِلَيْهِ تُحْشَرُوْنَ ﴿٢٠٣﴾

आणि अल्लाहतआलाचे स्मरण, त्या गणतीच्या थोडया दिवसांत (अय्यामे तशरीक) करा[६]. दोन दिवसांची घाई करणाऱ्यांवर पण काही गुनाह नाही आणि जो मागे राहून जाईल त्याच्यावर पण काही गुनाह नाही[७]. हे परहेजगारांसाठी आहे. आणि अल्लाहतआलाला भीत रहा. आणि लक्षात असू द्या तुम्ही सर्व त्याच्याकडे जमा केले जाणार आहात (२०३)

وَمِنَ النَّاسِ مَنْ يُّعْجِبُكَ قَوْلُهٗ فِى الْحَيٰوةِ الدُّنْيَا وَيُشْهِدُ اللّٰهَ عَلٰى مَا فِىْ قَلْبِهٖ ۙ وَهُوَ اَلَدُّ الْخِصَامِ ﴿٢٠٤﴾

काही लोकांच्या ऐहीक गरजेच्या गोष्टी तुम्हास खूष करून देतात; आणि तो आपल्या मनातील गोष्टींवर अल्लाहला साक्षीदार करतो. वास्तविक खरे पाहता तो अतिशय झगडाळू आहे[८]. (२०४)

وَاِذَا تَوَلّٰى سَعٰى فِى الْاَرْضِ لِيُفْسِدَ فِيْهَا وَيُهْلِكَ الْحَرْثَ وَالنَّسْلَ ؕ وَاللّٰهُ لَا يُحِبُّ الْفَسَادَ ﴿٢٠٥﴾

जेव्हा तो परत जातो, तेव्हा जमिनीत फसाद फैलावण्याचे, आणि शेती आणि वंशाचा विध्वंस करण्याच्या प्रयत्नात लागून रहातो आणि अल्लाहतआला नासधुसीला (फसाद) पसंत करीत नाही (२०५)

وَاِذَا قِيْلَ لَهُ اتَّقِ اللّٰهَ اَخَذَتْهُ الْعِزَّةُ بِالْاِثْمِ فَحَسْبُهٗ جَهَنَّمُ ؕ وَلَبِئْسَ الْمِهَادُ ﴿٢٠٦﴾

आणि जेव्हा त्याला सांगण्यात येते की, अल्लाहला भी, तर गर्व आणि शेखी त्याला गुनाह करण्याला प्रवृत्त करते[९]. अशांसाठी बस नरकाग्नीच आहे, आणि खचितच् ती फार वाईट जागा आहे (२०६)

وَمِنَ النَّاسِ مَنْ يَّشْرِىْ نَفْسَهُ ابْتِغَآءَ مَرْضَاتِ اللّٰهِ ؕ وَاللّٰهُ رَءُوْفٌۢ بِالْعِبَادِ ﴿٢٠٧﴾

आणि काही लोक असे पण आहेत की, अल्लाहतआलाच्या प्रसन्नतेच्या आकांक्षेमध्ये आपला जीव पण विकून टाकतात[१०], आणि अल्लाह तआला आपल्या सेवकांवर फारच करूणाशील आहे (२०७)

१) फज्ल ने अभिप्रेत व्यापार आणि कारभार आहे. म्हणजे हजच्या प्रवासांत व्यापार करायला काहीही हरकत नाही.

२) ९ जिलहिज्जाला, सूर्य ढळल्यापासून (जवाल) सूर्यास्तापर्यंत अरफातच्या मैदानात वकूफ (थांबून रहाणे) हजचे सर्वांत मोठे जरूरी अंग (रूक्न) आहे. ज्याच्याबाबतीत हदीसमध्ये म्हटले आहे, ''अरफात मध्ये 'वकूफ' म्हणजेच हज

आहे.'' (अल्हज्ज अरफतू) याठिकाणी मगरिबची नमाज पढावयाची नाही. परंतु 'मुजदलफा' पोहचून मगरिबची तीन रकात आणि इशाची दोन रकात (कसर), जमा करून, एक अजान आणि दोन इकामत बरोबर पढली जाईल, मुजदल्फालाच मशअरूल हराम म्हटले गेले आहे. कारण की ते हरमच्या आत आहे. येथे अल्लाहच्या स्मरणाची ताकीद आहे. येथे रात्र पार पाडावयाची आहे. फजरची नमाज़ अंधारात म्हणजे पहिल्या वेळांत पढून सूर्योदयापर्यंत जिक्रमध्ये व्यस्त रहावयास पाहिजे. सूर्योदयानंतर 'मिना'ला गेले पाहिजे.

३) उल्लेखित पद्धतीनुसार (तरतीब) अरफातला जाणे, आणि तेथे थांबून (वकुफ) परत येणे, जरूरी आहे. परंतु अरफात हरमच्या बाहेर असल्याने, कुरैशे मक्का, अरफात पर्यंत जात नसत आणि मुज़दलफाहूनच परत येत असत. म्हणून आदेश दिला जात आहे की, जेथून सर्व लोक जाऊन परत येतात, तेथूनच जाऊन परत या, म्हणजे अरफातहून.

४) अरबचे लोक, हज पूर्ण झाल्यावर मिनामध्ये मेळा भरवित आणि वाडवडीलांच्या कर्तृत्वाची चर्चा करीत. मुसलमानांना सांगण्यात येत आहे की, जोपर्यंत तुम्ही, १० जिलहाज्जला , 'कंकरी' मारणे, कुरबानी करणे, डोक्याचे मुंडन करणे, काब्याचा 'तवाफ' आणि सफा मर्वाची, 'सअी' करून फारिग होऊन जाल, तेव्हा याच्यानंतर तीन दिवस जो मिनामध्ये मुक्काम करावयाचा आहे; तेव्हा तेथे खूप अल्लाहचा जिक्र करा; जसे अज्ञान काळात तुम्ही आपल्या वाडवडीलांची चर्चा करीत असत.

५) म्हणजे सत्कृत्ये करण्याची सुबुद्धी म्हणजे, ईमानवाले या जगात सुद्धा दुनियाची आकांक्षा करीत नाही. परंतु पुण्य करण्याचीच आकांक्षा बाळगतात. नबी ﷺ ही प्रार्थना (दुआ) खूपच करीत असत; तवाफ मध्ये लोक, प्रत्येक प्रदक्षिणेची वेगवेगळी दुआ करीत असतात. ज्या स्वत:च त्यांनी काढल्या आहेत. त्याच्या ऐवजी तवाफच्या वेळी हीच दुआ (रब्बना आतेना फिद्दुनिया......) रुकने यमानी आणि हजरे अस्वद दरम्यान पढणे मसनुन अमल आहे.

६) याच्याने अभिप्रेत अय्यामे तश्‌रिक आहे; म्हणजे ११,१२ आणि १३ जिल्हज्ज यांच्यात अल्लाहचे स्मरण म्हणजे मोठ्या आवाजाने तकबीर पढणे मसनुन आहे. फक्त फर्ज नमाजीनंतरच नाही, (जसे की एका जअीफ हदीसीच्या बुनयादी वर मशहूर आहे.) परंतु प्रत्येक वेळी ही तकबीर पढली जावी. 'अल्लाहो अकबर, अल्लाहो अकबर, अल्लाहो अकबर, लाइलाह इल्ल्लाह्, वल्लाहु अकबर,अल्लाहो अकबर वलिल्लाहिल हम्द'' शैतानाला कंकरी मारतांना, प्रत्येक कंकरीवर तकबीर पढणे मसनुन आहे. (नैलूल अवतार ज.५ स ८६)

७) 'रमीएजिमार' (म्हणजे जमरातला कंकरी मारणे) ३ दिवस अफज़ल आहे, परंतु जर कोणी २ दिवस (११,१२ जिलहज्जा) कंकरिया मारून मिनाहून परत येऊन जाईल, तर याची पण परवानगी आहे.

८) काही कमजोर रिवायतीप्रमाणे हे महावाक्य एक दांभिक (मुनाफिक) 'अखनस बिन शरीक सकफी' च्या बाबतीत अवतीर्ण झालेली आहे; परंतु बरोबर (सहीतर) गोष्ट ही आहे की, याच्याने अभिप्रेत सर्व दांभिक आणि गर्विष्ट (मुतकब्बेरीन) आहेत; ज्यांच्यात ही लक्षणे आढळतील, जे कुरआनने याच्या संबंधात वर्णन केलेली आहेत.

९)'अखजतहुल इज्जतु बिल् इस्म' गर्व आणि शेखी त्याला गुनाह करण्याला प्रवृत्त करते. इज्जतचा अर्थ गर्व आणि शेखी आहे.

१०) असे म्हणतात की, हे महावाक्य, हजरत सोहैब रोमी ﵁ च्या बाबतीत अवतीर्ण झाले आहे की, जेव्हा ते हिजरत (देशत्याग) करू लागले तेव्हा काफिरांनी म्हटले की, ही सर्व संपत्ती येथील कमाविलेली आहे. हिला आम्ही बरोबर घेऊन जाऊ देणार नाही. हजरत सोहैब ﵁ नी ही सारी संपत्ती त्यांच्या हवाले करून दिली आणि दीन (धर्म) बरोबर घेऊन हुजूर ﷺ च्या सेवेत हजर झाले. आपण ﷺ ऐकून दोनदा म्हटले, ''सोहैब ﵁ नी नफा देणारा व्यापार केला आहे.'' (फत्हुल कदीर) परंतु हे महावाक्य पण सर्व साधारण आहे; जे तमाम विश्वासू, परहेजगार आणि या दुनियाच्या मुकाबल्यात धर्माला आणि आखेरतला प्राधान्य देणारे सर्वांना शामील करते कारण की, अशा प्रकारच्या सर्व महावाक्यांच्या बाबतीत जी काही विशिष्ट व्यक्ती किंवा प्रसंगाच्या बाबतीत अवतीर्ण झाली; हे तत्त्व आहे की, शब्दाच्या सर्व साधारण अर्थावर भरोसा केला जाईल. अवतरण्याच्या सबबीचा कोण्या विशिष्ट व्यक्ती (खुसुस) साठी भरोसा केला जाणार नाही. मग 'अखनस बिन शरीक' (ज्याचा उल्लेख मागील महावाक्यांत झाला) वाईट चारित्र्याचा एक नमुना आहे. जो त्या प्रत्येक व्यक्तीवर लागू होईल. जो याच्या सारख्या वाईट चारित्र्याचा असेल आणि सोहैब ﵁ भलाई आणि पराकाष्टेच्या ईमानाचे एक उदाहरण आहे. प्रत्येक त्या व्यक्तिला लागू होईल जी या विशिष्ट भलाई आणि ईमानाच्या पराकाष्टेने सुसज्जित असेल.

يَٰٓأَيُّهَا ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ ٱدْخُلُوا۟ فِى ٱلسِّلْمِ كَآفَّةً وَلَا تَتَّبِعُوا۟ خُطُوَٰتِ ٱلشَّيْطَٰنِ ۚ إِنَّهُۥ لَكُمْ عَدُوٌّ مُّبِينٌ ﴿٢٠٨﴾

**हे ईमानवाल्यांनो! इस्लाममध्ये पुरेचे पुरे दाखल होऊन जा. आणि शैतानच्या पावलांवर चालू नका[१]. तो तुमचा (खुल्लम) खुला दुष्मन आहे.** (२०८)

فَإِن زَلَلْتُم مِّنۢ بَعْدِ مَا جَآءَتْكُمُ ٱلْبَيِّنَٰتُ فَٱعْلَمُوٓا۟ أَنَّ ٱللَّهَ عَزِيزٌ حَكِيمٌ ﴿٢٠٩﴾

**मग जर तुमच्याजवळ स्पष्ट निशाण्या आल्यानंतर सुद्धा डगमगून जाल, तर जाणून घ्या की, अल्लाहतआला परम समर्थ आणि बुद्धीवान (हिकमतवाला) आहे** (२०९)

٢٥ ع ١٤ ٩

هَلْ يَنظُرُونَ إِلَّآ أَن يَأْتِيَهُمُ ٱللَّهُ فِى ظُلَلٍ مِّنَ ٱلْغَمَامِ وَٱلْمَلَٰٓئِكَةُ وَقُضِىَ ٱلْأَمْرُ ۚ وَإِلَى ٱللَّهِ تُرْجَعُ ٱلْأُمُورُ ﴿٢١٠﴾

२५ ع १४ ९

**काय लोकांना या गोष्टीची प्रतीक्षा आहे की, त्यांचे जवळ स्वत: अल्लाहतआलाने ढगांचे छत्र लावून येवून जावे आणि देवदूतांनी सुद्धा आणि काम त्याच्या शेवटापर्यंत पोहचवून[२] दिले जावे. आणि अल्लाहकडेच सर्व कामे परतवले जातात.** (२१०)

سَلْ بَنِىٓ إِسْرَٰٓءِيلَ كَمْ ءَاتَيْنَٰهُم مِّنْ ءَايَةٍۭ بَيِّنَةٍ ۗ وَمَن يُبَدِّلْ نِعْمَةَ ٱللَّهِ مِنۢ بَعْدِ مَا جَآءَتْهُ فَإِنَّ ٱللَّهَ شَدِيدُ ٱلْعِقَابِ ﴿٢١١﴾

**बनी इस्राईलला विचारा (तर खरे) की, आम्ही कितीतरी त्यांना खुल्या निशाण्या दिल्या[३] आणि जो मनुष्य अल्लाहतआलाच्या देणग्यांना आपल्याजवळ पोहचल्यानंतर बदलून टाकेल[४]; (त्याने लक्षांत असू द्यावे) की अल्लाहतआला पण कडक शिक्षा करणारा आहे.** (२११)

१) ईमानवाल्यांना सांगण्यात येत आहे की, इस्लाममध्ये पुरेच्या पुरे दाखल होऊन जा. असे करू नका की, ज्या गोष्टी तुमच्या मर्जीच्या आणि तुमच्या इच्छेप्रमाणे असतील. त्यांच्यावर तर अंमलबजावणी कराल आणि दुसऱ्या आदेशांना दृष्टीआड करून टाकाल. त्याचप्रमाणे जो धर्म तुम्ही सोडून आला आहात. त्याच्या गोष्टी इस्लाममध्ये दाखल करण्याचा प्रयत्न करू नका. परंतु फक्त इस्लामलाच संपूर्णपणे आत्मसात करा. यामुळे धर्मात बिदअतचा इन्कार करण्यात आला आणि धर्मनिरपेक्ष विचारांनापण रद्द करण्यात आले. जे इस्लामला संपूर्णपणे अंगिकारण्याला तयार नाही. परंतु धर्माला, इबादत म्हणजे मशिदीपुरते मर्यादित करणे आणि राजकारण व सत्ता मिळविण्यापासून हद्दपार (देस निकाल) करू इच्छितो. याप्रमाणे समाजाला पण समजाविण्यात येत आहे. ज्या चालीरिती आणि प्रादेशिक संस्कृती (सकाफत) आणि रिवायातला (उल्लेखांना) पसंत करतात आणि त्यांना सोडावयास तयार होत नाही. जसे मृत्यू आणि लग्नाच्या वेळेची फुजुलखर्ची आणि गैरइस्लामी रस्म आणि इतर रिवाज आणि हे सांगण्यात येत आहे की, शैतानाच्या पावलावर पाऊल ठेवून चालू नका. जो तुम्हाला वर वर्णन केलेल्या इस्लामविरोधी गोष्टीसाठी सुंदर तत्त्वज्ञान काढून तुम्हास सादर करतो. वाईट गोष्टींवर चांगले दिसणारे आच्छादन घालून आणि बिदअतपण पुण्य आहे, असे भासवितो. कारण की त्याच्या जाळ्यात फसून रहा.

२) हे एक तर कयामतचे दृश्य आहे, (जसे की काही भाष्यांच्या उल्लेखांत आहे – इब्ने कसीर) म्हणजे काय हे कयामत येण्याची वाट पहात आहे? किंवा मग याचा अर्थ असा आहे की, अल्लाहतआलाने देवदूतांचे सोबत आभाळाच्या छत्रांत यांच्यासमोर यावे; आणि निर्णय करून टाकावा? तेव्हा ते ईमान आणतील. परंतु असा इस्लाम कबूल करण्यासारखा नाही. यासाठी इस्लाम कबूल करण्यात दिरंगाई करू नका आणि ताबडतोब इस्लाम कबूल करून आपले परलोक सावरून घ्या.

३) उदाहरणार्थ, मूसा عليه السلام ची काठी जिच्यामार्फत आम्ही जादूगिरांना परास्त केले, समुद्रातून रस्ता काढला, दगडातून बारा झरे वहावून काढले, ढगांची सावली, मन्न व सल्वाचे उतारणे वगैरे जे अल्लाहतआलाचे सामर्थ्य आणि आमच्या पैगंबराच्या सत्यतेचा पुरावा होते. परंतु असे असतांना सुद्धा त्यांनी, अल्लाहच्या हुकूमाकडून तोंड फिरवले.

४) नेआमतच्या बदलण्याचा अर्थ असा की, त्यांनी ईमानच्या बदल्यांत कुफ्र केले आणि तोंड फिरवण्याचा मार्ग स्वीकारला.

زُيِّنَ لِلَّذِيْنَ كَفَرُوا الْحَيٰوةُ الدُّنْيَا وَيَسْخَرُوْنَ
مِنَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا ۘ وَالَّذِيْنَ اتَّقَوْا فَوْقَهُمْ يَوْمَ
الْقِيٰمَةِ ۗ وَاللّٰهُ يَرْزُقُ مَنْ يَّشَآءُ بِغَيْرِ حِسَابٍ ﴿٢١٢﴾

**काफिरांसाठी (ह्या) जगांतले जीवन फारच शोभायमान बनवून देण्यांत आले आहे; ते ईमानवाल्यांशी थट्टा मस्करी[१] करतात;वास्तविक पहाता, परेहजगार लोक (पुण्यवान लोक) कयामतच्या दिवशी त्यांच्यावर प्रतिष्ठित राहतील; अल्लाहतआला ज्याला इच्छितो भरपूर उपजिविका[२] देतो (२१२)**

كَانَ النَّاسُ اُمَّةً وَّاحِدَةً ۣ فَبَعَثَ اللّٰهُ النَّبِيّٖنَ
مُبَشِّرِيْنَ وَ مُنْذِرِيْنَ ۠ وَاَنْزَلَ مَعَهُمُ الْكِتٰبَ
بِالْحَقِّ لِيَحْكُمَ بَيْنَ النَّاسِ فِيْمَا اخْتَلَفُوْا فِيْهِ ۭ
وَمَا اخْتَلَفَ فِيْهِ اِلَّا الَّذِيْنَ اُوْتُوْهُ مِنْۢ بَعْدِ
مَا جَآءَتْهُمُ الْبَيِّنٰتُ بَغْيًاۢ بَيْنَهُمْ ۚ فَهَدَى اللّٰهُ
الَّذِيْنَ اٰمَنُوْا لِمَا اخْتَلَفُوْا فِيْهِ مِنَ الْحَقِّ بِاِذْنِهٖ ۭ
وَاللّٰهُ يَهْدِيْ مَنْ يَّشَآءُ اِلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿٢١٣﴾

**खरे पाहता लोकांचा एकच समूह होता[३]. अल्लाहतआलाने पैगंबरांना खुषखबरी देणारे आणि (अल्लाहकडून) भिवविणारे बनवून पाठविले आणि त्यांच्याबरोबर सत्य पुस्तके अवतरीत केली की, लोकांच्या प्रत्येक मतभेद असलेल्या बाबीत निर्णय होऊन जावा. आणि फक्त त्याच लोकांनी ज्यांना (पुस्तके) दिली गेली होती, आपल्याजवळ निशाण्या आल्यानंतर आपसांतील द्वेषाच्या कारणाने, याच्यात मतभेद केला[४]. म्हणून अल्लाहपाकने ईमानवाल्यांना या मतभेदांत सुद्धा सत्याकडे आपल्या स्वसंकल्पाने (मशीय्यत) मार्गदर्शन केले आणि[५] अल्लाह ज्याला इच्छितो, सरळमार्गाकडे मार्गदर्शन करतो (२१३)**

اَمْ حَسِبْتُمْ اَنْ تَدْخُلُوا الْجَنَّةَ وَلَمَّا يَاْتِكُمْ مَّثَلُ
الَّذِيْنَ خَلَوْا مِنْ قَبْلِكُمْ ۭ مَسَّتْهُمُ الْبَاْسَآءُ وَ
الضَّرَّآءُ وَ زُلْزِلُوْا حَتّٰى يَقُوْلَ الرَّسُوْلُ وَالَّذِيْنَ
اٰمَنُوْا مَعَهٗ مَتٰى نَصْرُ اللّٰهِ ۭ اَلَآ اِنَّ نَصْرَ اللّٰهِ قَرِيْبٌ ﴿٢١٤﴾

**काय तुम्ही (असा) गुमान करून बसला आहात की, स्वर्गात चालले जाल? वास्तविक पाहतां, आतापर्यंत तुमच्यावर त्या बिकट परिस्थिती आल्या नाहीत, ज्या तुमच्या पूर्वीच्या लोकांवर आल्या होत्या[६]. त्यांच्यावर आजारपण आणि संकटे आली, आणि ते झटकारलेही गेले; येथपर्यंत की पैगंबर आणि त्यांच्याबरोबर जे ईमानवाले होते, म्हणू लागले की अल्लाहची मदत केव्हा येणार? ऐकून असा की अल्लाहची मदत जवळच आहे[७] (२१४)**

يَسْـَٔلُوْنَكَ مَاذَا يُنْفِقُوْنَ ڛ قُلْ مَآ اَنْفَقْتُمْ مِّنْ خَيْرٍ
فَلِلْوَالِدَيْنِ وَالْاَقْرَبِيْنَ وَالْيَتٰمٰى وَالْمَسٰكِيْنِ
وَابْنِ السَّبِيْلِ ۭ وَمَا تَفْعَلُوْا مِنْ خَيْرٍ فَاِنَّ اللّٰهَ
بِهٖ عَلِيْمٌ ﴿٢١٥﴾

**आपणांस विचारतात की, त्यांनी काय खर्च करावा? आपण सांगून टाका जो माल तुम्ही खर्च कराल (तो) आईबापासाठी आहे आणि नातेवाईकांसाठी आणि अनाथांसाठी आणि गरीब व मुसाफिरांसाठी आहे[८]. आणि तुम्ही जी काही भलाई कराल, अल्लाहतआलाला त्याचे ज्ञान आहे (२१५)**

كُتِبَ عَلَيْكُمُ الْقِتَالُ وَهُوَ كُرْهٌ لَّكُمْ ۚ وَعَسٰٓى اَنْ
تَكْرَهُوْا شَيْـًٔا وَّهُوَ خَيْرٌ لَّكُمْ ۚ وَعَسٰٓى اَنْ تُحِبُّوْا
شَيْـًٔا وَّهُوَ شَرٌّ لَّكُمْ ۭ وَاللّٰهُ يَعْلَمُ وَاَنْتُمْ لَا تَعْلَمُوْنَ ﴿٢١٦﴾

**तुमच्यावर जिहाद फर्ज केले गेले, जरी ते तुम्हास आवडेनासे वाटेल, शक्यता आहे की, तुम्ही कोण्या गोष्टीला वाईट समजतात आणि वास्तविक तीच तुमच्यासाठी भली असेल, आणि हेही शक्य आहे की, तुम्ही कुण्या गोष्टीला चांगली समजाल. वास्तविक ती तुमच्यासाठी वाईट असेल. खरे ज्ञान तर अल्लाहलाच आहे. तुम्ही निव्वळ अजाण आहात[९]. (२१६)**

२६ / ४ / १०

१) कारण की मुसलमानांमध्ये बहुत्तायत गरीब लोक होते जे, ऐहिक आराम व सुख आणि सवलतीपासून वंचित होते. यामुळे काफिर म्हणजे कुरैशे मक्का त्यांची टिंगल करत होते जसा की श्रीमंत लोकांचा प्रत्येक काळांत दस्तुर असतो.

२) ईमानवाल्यांची गरीबी आणि साधेपणाची काफिरलोक थट्टामस्करी आणि टिंगल करीत; याचा उल्लेख करून सांगण्यात येते की, कयामतच्या दिवशी हेच गरीब लोक आपल्या तकव्याच्या (ईशभयाच्या) जोरावर उच्चपदावर विराजमान होतील. भरपूर उपजिवीकेचा संबंध परलोकांशिवाय या जगात पण होऊ शकतो. कारण थोड्याच वर्षानंतर अल्लाहतआलाने या गरीबांवरसुद्धा धनसंपत्तीचे (फुतुहात) दरवाजे उघडून दिले, ज्यामुळे भरपूर उपजिवीका आणि ऐहीक सामानांची रेलपेल होऊन गेली.

३) म्हणजे एकेश्वरवादावर, हे हजरत आदम (عليه السلام) पासून हजरत नूह. (عليه السلام) पर्यंत म्हणजे दहा कालखंडापर्यंत (कुरून) लोक एकेश्वरवादावर ज्याचे शिक्षण पैगंबर देत राहिले, कायम राहिले. काही भाष्यकारांच्या मते शैतानाच्या वसवसे

टाकण्यामुळे त्यांच्यात मतभेद निर्माण झाले आणि शिर्क आणि मूर्तीपूजा सार्वत्रिक होऊन गेली. मग अल्लाहतआलाने पैगंबरांना पुस्तकासह पाठवून दिले की, त्यांनी लोकांच्या मध्ये असलेल्या मतभेदांचा निर्णय आणि सत्य आणि एकेश्वरवादाला कायम आणि स्पष्ट करून द्यावे (इब्ने कसीर)

४) मतभेद नेहमी सत्यमार्गापासून विचलित होण्यामुळे होत असतो आणि या विचलित होण्याचे कारण द्वेष आणि वांशिक श्रेष्ठत्व असते. उम्मते मुस्लेमामध्ये सुद्धा जोपर्यंत ही खराबी आली नाही, ही उम्मत आपल्या मूळ स्थितीवर कायम आणि मतभेदांच्या तिव्रतेपासून सुरक्षित राहिली. परंतु अंधानुकरण (तकलीद) आणि बिदआतने सत्यापासून पळ काढण्याचा जो मार्ग प्रशस्त केला; त्याच्यामुळे मतभेदाचे वर्तुळ पसरत आणि वाढतच राहिले. इथपावेतो की, उम्मतची एकता एक अशक्य गोष्ट बनून राहून गेली. (फहदल्लाहुल मुस्लेमीन - अल्लाह मुसलमानांना हिदायत देवो. आमीन)

५) उदाहरणार्थ, ग्रंथधारी लोकांनी जुमआत मतभेद केला, यहूद्यांनी शनिवारला आणि खिस्त्यांनी रविवारला, आपला पवित्र दिवस ठरवला, तेव्हा अल्लाहतआलाने मुसलमानांना शुक्रवारचा दिवस अखत्यार करण्याची हिदायत दिली. त्यांनी ह. ईसा. عليه السلام च्या बाबतीत मतभेद केले. यहूद्यांनी त्यांना खोटे ठरविले. आणि त्यांची आई ह.मर्यम عليها السلام वर खोटा आळ घेतला. याउलट खिस्त्यांनी त्यांना अल्लाहचा पुत्र आणि उपास्य बनवून टाकले. अल्लाहने मुसलमानांना यांच्याबाबतीत खरी वस्तूस्थिती अंगिकारण्याची सुबुद्धी दिली की, ते अल्लाहचे पैगंबर आणि त्याचे आज्ञाधारक सेवक होते. हजरत इब्राहीम عليه السلام च्या बाबतीत पण त्यांनी मतभेद केला. एकाने यहूदी व दुसऱ्याने त्यांना खिस्ती म्हटले. मुसलमानांना अल्लाहतआलाने सत्य गोष्ट सांगितली की, ते ''हनीफन् मुस्लेमा'' होते आणि अशा प्रकारच्या दुसऱ्या अनेक गोष्टी (मसाईल) मध्ये अल्लाहतआलाने आपल्या इज्न म्हणजे आपल्या कृपेने मुसलमानांना सरळ मार्ग दाखविला.

६) मदिनेच्या हिजरत नंतर जेव्हा मुसलमानांना यहूदी, मुनाफीक (दांभिक) आणि अरबच्या बहुदेववाद्यांकडून वेगवेगळ्या प्रकारच्या ईजा आणि त्रास झाला, तर काही मुसलमानांनी नबी ﷺ जवळ तक्रार केली. ज्यावर मुसलमानांच्या सांत्वनासाठी हे महावाक्य पण अवतरीत झाले आणि स्वत: नबी ﷺ नी पण म्हटले, ''तुमच्या पूर्वीच्या लोकांना डोक्यापासून पायापर्यंत करवतीने कापले गेले आणि लोखंडाच्या सांडशीने त्यांच्या मांसाचे लचके तोडण्यात आले. परंतु हा जुलूम व सख्ती त्यांना त्यांच्या धर्मापासून फिरवू शकली नाही'' मग सांगितले, ''अल्लाहची शपथ! अल्लाहतआला या मामल्याला संपूर्ण म्हणजे इस्लामला वर्चस्व देईल.'' येथपावेतो की, एक स्वार सनआ पासून हज़रेमूतपर्यंत एकटा प्रवास करील, आणि त्याला अल्लाहशिवाय कोणाचेही भय राहणार नाही.'' (सहीह बुखारी) तात्पर्य, नबी ﷺ चा मुसलमानांमध्ये धाडस आणि दृढनिश्चय (इस्तकामत) पैदा करण्याचा प्रयत्न होता.

७) याच्याकरीता की, 'प्रत्येक येणारी वस्तू, जवळ आहे.' आणि ईमानवाल्यांसाठी अल्लाहची मदत निश्चित आहे. म्हणून तो जवळच आहे.

८) काही सहाबा رضي الله عنهم च्या चौकशी करण्यावरून माल खर्च करण्याच्या प्रथम ठिकाणांचे वर्णन करण्यात येत आहे. म्हणजे हे तुमच्या आर्थिक मदतीचे सर्वात जास्त हकदार आहेत. याच्यावरून ठाऊक झाले की, इन्फाकचा (अल्लाहतआलाच्या मार्गातील खर्च) हा आदेश नफील सदक्याशी संबंधित आहे. हा जकातशी संबंधित नाही. कारण आईबापावर जकातची रक्कम खर्च करणे योग्य नाही. हजरत मैमून बिन मेहरान رحمه الله नी या महावाक्याचे पठन करून म्हटले, ''माल खर्च करण्याच्या या जगांत तबला सारंगीचा उल्लेख नाही आणि चित्रांचा तसेच भिंतीवर लटकवून देण्यांत घेणाऱ्या सजावटी पदर्याचापण उल्लेख नाही.'' अर्थ असा की, या वस्तूंवर खर्च करणे नावडता आणि फुजुल खर्च आहे. खेद आहे की, आज हे फुजुल आणि नावडते खर्च, आमच्या जीवनांचा इतका अत्यावश्यक भाग बनून गेला आहे की, त्यात घृणा (कराहत) करण्याची कुठलीही बाजू आमच्या दृष्टीपथात येत नाही.

९) जिहादच्या आदेशाचे एक उदाहरण देऊन ईमानवाल्यांना समजाविले जात आहे की, अल्लाहच्या प्रत्येक हुकूमांवर अंमलबजावणी करा. जरी तो तुम्हास जड आणि नागवारच का वाटेना ! यासाठी की याच्या अंजाम आणि परीणामाला फक्त अल्लाहतआलाच जाणतो; तुम्ही जाणत नाही. होऊ शकते की याच्यांत तुमच्यासाठी भलाई असेल. जसा जिहादच्या परिणामांत तुम्हाला विजय, वरचढत्व, प्रतिष्ठा व मानताठ करणे व मालमत्तेचे मिळणे असू शकते. याप्रमाणे तुम्ही ज्याला पसंत करतात (म्हणजे जिहादच्या ऐवजी घरांत बसून रहाणे) याचा परिणाम तुमच्यासाठी भयानक होऊ शकतो. म्हणजे शत्रू तुम्हाला जिंकून (गालीब) घेईल. आणि तुम्हाला फजिती आणि अप्रतिष्ठेचा सामना करावा लागेल.

يَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الشَّهْرِ الْحَرَامِ قِتَالٍ فِيْهِ ۭ قُلْ قِتَالٌ فِيْهِ كَبِيْرٌ ۭ وَصَدٌّ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ وَكُفْرٌۢ بِهٖ وَالْمَسْجِدِ الْحَرَامِ ۤ وَاِخْرَاجُ اَهْلِهٖ مِنْهُ اَكْبَرُ عِنْدَ اللّٰهِ ۚ وَالْفِتْنَةُ اَكْبَرُ مِنَ الْقَتْلِ ۭ وَلَا يَزَالُوْنَ يُقَاتِلُوْنَكُمْ حَتّٰى يَرُدُّوْكُمْ عَنْ دِيْنِكُمْ اِنِ اسْتَطَاعُوْا ۭ وَمَنْ يَّرْتَدِدْ مِنْكُمْ عَنْ دِيْنِهٖ فَيَمُتْ وَھُوَ كَافِرٌ فَاُولٰۗىِٕكَ حَبِطَتْ اَعْمَالُهُمْ فِي الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ ۚ وَاُولٰۗىِٕكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ ھُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٢١٧﴾

लोक आपल्याला आदरणीय महिन्यांत युद्धाच्या संदर्भात प्रश्न करतात. आपण सांगून टाका की, त्यांत युद्ध करणे, मोठा गुनाह आहे; परंतु अल्लाहच्या मार्गात अडथळा करणे, अल्लाहला (जसे पाहिजे तसे) न मानणे, मस्जिदे हरामपासून मज्ञाव करणे, आणि तेथे राहणाऱ्यांना तेथून काढणे, अल्लाहजवळ यापेक्षाही मोठे पाप आहे. हा अत्याचार खुनापेक्षाही मोठे पाप आहे[१]. हे लोक तुमच्याबरोबर लढाई झगडे करतच राहतील. येथपावेतो की, जर त्यांना शक्य झाले तर तुम्हाला तुमच्या धर्मापासून फिरवून टाकावे[२]. आणि तुमच्यापैकी जे लोक आपल्या धर्माकडून फिरून जातील आणि याच कुफ्रच्या स्थितीत मृत्यू पावतील, त्यांची कर्मे इहलोकांची आणि परलोकांची सर्व अक्रित (वाया) जातील. हे लोक जहन्नम मध्ये जाणारे असतील आणि नेहमी करता जहन्नममध्ये राहतील[३] ﴿२१७﴾

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَالَّذِيْنَ ھَاجَرُوْا وَجٰهَدُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ۙ اُولٰۗىِٕكَ يَرْجُوْنَ رَحْمَتَ اللّٰهِ ۭ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٢١٨﴾

परंतु ईमान आणणारे,हिजरत करणारे, अल्लाहच्या मार्गात जिहाद करणारेच अल्लाहच्या दयेस पात्र आहेत. अल्लाहतआला फारच पश्चात्ताप मान्य करणारा आणि दयाळू आहे ﴿२१८﴾

يَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الْخَمْرِ وَالْمَيْسِرِ ۭ قُلْ فِيْهِمَآ اِثْمٌ كَبِيْرٌ وَّمَنَافِعُ لِلنَّاسِ ۡ وَاِثْـمُهُمَآ اَكْبَرُ مِنْ نَّفْعِهِمَا ۭ وَيَسْـَٔلُوْنَكَ مَاذَا يُنْفِقُوْنَ ڛ قُلِ الْعَفْوَ ۭ كَذٰلِكَ يُبَيِّنُ اللّٰهُ لَكُمُ الْاٰيٰتِ لَعَلَّكُمْ تَتَفَكَّرُوْنَ ﴿٢١٩﴾

लोक आपणास दारू आणि जुगारी बाबत मसला विचारतात. आपण सांगून टाका (की) या दोहोत फार मोठे पाप[४] आहे आणि लोकांना त्याच्यापासून ऐहीक फायदा पण होतो. परंतु त्यांचे पाप त्यांच्या नफ्यापेक्षा फारच जास्त[५] आहेत. आपणास हे सुद्धा विचारतात की, त्यांनी (अल्लाहच्या मार्गात) काय खर्च करावा? तर आपण सांगून टाका की, जरूरीपेक्षा जे जास्त[६] असेल; अल्लाहतआला अशाचप्रकारे आपले आदेश तुमच्यासाठी साफ साफ (स्पष्ट) करून सांगत आहे की, तुम्ही मननपूर्वक विचार कराल ﴿२१९﴾

فِى الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ ۭ وَيَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الْيَتٰمٰي ۭ قُلْ اِصْلَاحٌ لَّھُمْ خَيْرٌ ۭ وَاِنْ تُخَالِطُوْھُمْ فَاِخْوَانُكُمْ ۭ وَاللّٰهُ يَعْلَمُ الْمُفْسِدَ مِنَ الْمُصْلِحِ ۭ وَلَوْ شَاۗءَ اللّٰهُ لَاَعْنَتَكُمْ ۭ اِنَّ اللّٰهَ عَزِيْزٌ حَكِيْمٌ ﴿٢٢٠﴾

तुम्हाला इहलोकात आणि परलोकात आणि अनाथांच्या बाबतीत प्रश्न करत आहे,[७] तर आपण त्यांना समजावून द्या की, ज्यांत त्यांची सुधारणा होईल (तेच) उत्तम होय. आणि त्यांच्याशी मिळून मिसळून रहाल तर ते तुमचे भाऊ आहेत. दुर्धारकाला आणि सुधारकाला प्रत्येकाला अल्लाहतआला खूप ओळखून आहे. आणि जर अल्लाह इच्छिता तर तुम्हास कष्टात टाकता[८]. नि:संशय अल्लाहतआला सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे ﴿२२०﴾

१) रजब, जुल्‌कादा, जुल्‌हिज्जा आणि मोहर्रम हे चार महिने पण अज्ञान काळात सुद्धा प्रतिष्ठीत समजले जात होते. ज्यांच्यात लढाई आणि रक्तपात नावडता होता. इस्लामने सुद्धा याची प्रतिष्ठा कायम ठेवली. नबी ﷺ च्या काळात एका मुसलमान फौजी तुकडीच्या हातून रजबच्या महिन्यांत एका काफिराचा वध झाला. आणि काही काफिर कैदी बनवून घेण्यात आले. मुसलमानांना हे ठाऊक नव्हते की, रजब सुरू होऊन गेला आहे. काफिरांनी मुसलमानांना टोमणा मारला की, पहा हे प्रतिष्ठीत महिन्याच्या प्रतिष्ठेचा पण विचार करीत नाही. ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले आणि सांगितले गेले की,खचितच् प्रतिष्ठीत महिन्यांत रक्तपात मोठा गुनाह (महापाप) आहे. परंतु प्रतिष्ठेची दुहाई देणाऱ्यांना आपले कर्म दिसले नाही ? हे स्वत: याच्यापेक्षाही मोठ्या पापाचे धनी आहेत, हे अल्लाहच्या मार्गापासून आणि मस्जिदे हरामपासून लोकांना अडवितात. आणि तेथून मुसलमानांना काढण्याला भाग पाडले. याशिवाय कुफ्र आणि शिर्क हाच खुनापेक्षाही मोठा गुनाह आहे. म्हणून जर मुसलमानांकडून चुकीने एखादा कत्ल (वध) प्रतिष्ठीत महिन्यांत होऊन गेला, तर काय झाले ? याच्यावर हंगामा करण्याऐवजी त्यांनी आपली काळी कृत्ये तर पाहून घ्यायला पाहिजे.

२) जेव्हा हे आपल्या खोडसळपणा, कटकारस्थाने आणि तुम्हाला धर्माकडून फिरवून देण्याच्या प्रयत्नांकडून माघार घेणार नाही. तर तुम्ही त्यांच्याशी मुकातला (एक दुसऱ्याला ठार करणे)करण्यासाठी प्रतिष्ठीत महिन्याच्या कारणाने का थांबून जावे?

३) जो इस्लामकडून फिरून जाईल, म्हणजे मुर्तद होऊन जाईल ( जर त्याने तौबा केली नाही) तर त्याची या दुनियेतील शिक्षा त्याला ठार करणे आहे. हदीसमध्ये आहे, 'मन् बद्दला दीनहू फक्तुलूहू' (सहीह बुखारी) या महावाक्यात त्याची परलोकातील शिक्षा वर्णन करण्यात येत आहे. ठाऊक झाले की, ईमानच्या स्थितीत केलेली सत्कृत्ये पण कुफ्र आणि धर्माकडून फिरून जाण्याच्या कारणाने, बुडीत (आक्रित) होऊन जातील. आणि ज्याप्रमाणे ईमान कबूल केल्याने माणसाचे मागचे सर्व अपराध माफ केले जातात; त्याचप्रमाणे कुफ्र आणि मुर्तद झाल्याने सर्व पुण्य (नेकीया) बरबाद होऊन जाते. तथापि कुरआनाच्या शब्दांनी स्पष्ट आहे की, सत्कृत्य त्याचवेळी व्यर्थ होईल, जेव्हा शेवट कुफ्रवर होईल. जर मृत्यूच्या पूर्वी तौबा करणारा होऊन जाईल, तर असे होणार नाही. म्हणजे मुर्तदची पुन्हा ईमान आणल्यानंतर तौबा कबूल आहे.

४) मोठा गुनाह तर धर्माच्या दृष्टीकोनातून आहे.

५) फायद्याचा संबंध या जगाशी आहे. उदा.दारूमुळे तात्पुरते शरीरात उत्साह आणि तरतरी, काहींच्या मेंदूत तेजी येते. कामशक्तीमध्ये वाढ होऊन जाते. ज्याच्यामुळे याचा उपयोग सर्रास करतात. त्याचप्रमाणे याची खरेदी विक्री नफा देणारा व्यवहार आहे. जुगारीमध्ये मनुष्य कधी कधी जिंकून जातो. तर त्याला काही माल (धन) मिळून जाते; परंतु हे फायदे त्या नुकसान आणि घाट्याच्या मुकाबल्यात नगन्य आहेत, जे माणसाला त्याच्या बुद्धीला आणि त्याच्या धर्माला यामुळे होतात. यासाठी म्हटले आहे की, ''यांचे पातक, त्यांच्या फायद्यापेक्षा फार जास्त आहे.'' अशाप्रकारे या महावाक्यात, दारूला आणि जुगाराला हराम तर ठरविण्यात आले नाही, तथापि (त्यावर बंदीसाठी) प्रस्तावना करण्यात आली आहे. या महावाक्यामुळे एक फार महत्त्वाचे तत्त्व पण ठाऊक झाले की, प्रत्येक वस्तूमध्ये मग ती, किती का वाईट असेना काही ना काही फायदेपण असतात. उदाहरणार्थ रेडीओ, टी.व्ही. आणि दुसरे याप्रकारचे शोध आहेत आणि लोक यांचे काही फायदे वर्णन करून आपल्या स्वत:ला धोका देतात. वास्तविक हे बघावयास हवे की, फायदे आणि नुकसान यांचे प्रमाणे किती आहे; विशेष करून धर्म आणि ईमान, चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या अनुषंगाने, जर धार्मिक दृष्टीकोनातून नुकसान आणि घाटे जास्त असतील तर थोड्याशा ऐहिक फायद्यासाठी त्याला योग्य (जाएज) ठरविण्यात येणार नाही.

६) या अर्थाच्या अनुषंगाने ही सद्व्यवहारी सूचना आहे किंवा हा आदेश सुरवातीच्या इस्लाममध्ये देण्यात आला. ज्यावर जकात फर्ज झाल्यानंतर अंमल करणे जरूरी राहीले नाही. तथापि उत्तम जरूर आहे किंवा याचा अर्थ आहे,''जे सोपे आणि सवलतीने होईल, आणि मनाला जड जाणार नाही.'' (फत्हुल कदीर) इस्लामने खचितच् इन्फाक (अल्लाहच्या मार्गात खर्च करण्या) ला बरेच प्रोत्साहन दिले आहे. परंतु मध्यमार्ग अंगिकारण्याला बाकी ठेवले आहे; की आपल्या अधिपत्याखालील व्यक्तींची वास्तपूस आणि त्यांच्या आवश्यकतेला प्राधान्य देण्याचा आदेश दिला गेला आहे. दुसरे की, अशाप्रकारे खर्च करण्यास मनाई केली गेली आहे की, उद्याला तुम्हाला किंवा तुमच्या घरच्या लोकांना दुसऱ्यांपुढे हात पसरवण्याची पाळी यावी.

७) जेव्हा अनाथांचा माल, अन्यायाने खाणाऱ्यांवर सजा देण्याची धमकी देण्यात आली, तेव्हा सहाबा कराम ﷺ भ्याले आणि अनाथांची प्रत्येक वस्तू वेगळी करून दिली. येथपावेतो की, खाण्यापिण्याची काही वस्तू शिल्लक राहिली, तर तिचा सुद्धा उपयोग करत नसत. आणि ती खराब होऊन जाई. या भीतीपोटी की, कोठे आम्ही सुद्धा या सजा देण्याच्या धमकीत (वईद) योग्य न ठरविले जाओत. यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले (इब्ने कसीर)

८) म्हणजे तुम्हाला, त्यांच्यात सुधारणा व भलाई करण्याच्या उद्देशाने, त्याचा माल आपल्या मालांत मिळवून घेण्याची परवानगी न देता.

وَلَا تَنْكِحُوا الْمُشْرِكٰتِ حَتّٰى يُؤْمِنَّ ۭ وَلَاَمَةٌ مُّؤْمِنَةٌ خَيْرٌ مِّنْ مُّشْرِكَةٍ وَّلَوْ اَعْجَبَتْكُمْ ۚ وَلَا تُنْكِحُوا الْمُشْرِكِيْنَ حَتّٰى يُؤْمِنُوْا ۭ وَلَعَبْدٌ مُّؤْمِنٌ خَيْرٌ مِّنْ مُّشْرِكٍ وَّلَوْ اَعْجَبَكُمْ ۭ اُولٰۗىِٕكَ يَدْعُوْنَ اِلَى النَّارِ ښ وَاللّٰهُ يَدْعُوْٓا اِلَى الْجَنَّةِ وَالْمَغْفِرَةِ بِاِذْنِهٖ ۚ وَيُبَيِّنُ اٰيٰتِهٖ لِلنَّاسِ لَعَلَّهُمْ يَتَذَكَّرُوْنَ ٢٢١

**आणि मुशरिक स्त्रियांशी जोपर्यंत त्या ईमान आणणार नाहीत लग्न करू नका[१]. ईमानदार दासीपण शिर्क करणाऱ्या स्वतंत्र स्त्रीपेक्षा फार उत्तम आहे; जरी मुश्रिक स्त्रीच तुम्हास चांगली वाटत असेल आणि शिर्क करणाऱ्या पुरूषांना आपल्या स्त्रियांशी लग्न करू देऊ नका जोपर्यंत ते ईमान आणणार नाही. विश्वासू दास, स्वतंत्र मुशरिकपेक्षा, उत्तम आहे, जरी तुम्हास मुशरिक चांगला वाटत असेल. हे लोक नरकाग्नीकडे बोलावतात आणि अल्लाह स्वर्गाकडे आणि तारणाकडे (बख्शिश) आपल्या हुकूमाने बोलवितो. तो आपली महावाक्ये लोकांसाठी वर्णन करीत आहे. कारण त्यांनी आदेश ग्रहण करावा (२२१)**

وَيَسْـَٔـلُوْنَكَ عَنِ الْمَحِيْضِ ۭ قُلْ هُوَ اَذًى ۙ فَاعْتَزِلُوا النِّسَاۗءَ فِي الْمَحِيْضِ ۙ وَلَا تَقْرَبُوْھُنَّ حَتّٰى يَطْهُرْنَ ۚ فَاِذَا تَطَهَّرْنَ فَاْتُوْھُنَّ مِنْ حَيْثُ اَمَرَكُمُ اللّٰهُ ۭ اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ التَّوَّابِيْنَ وَيُحِبُّ الْمُتَطَهِّرِيْنَ ٢٢٢

**आपल्याला ऋतुस्त्रावाबद्दल प्रश्न करतात (आपण) सांगून द्या की, तो मल (गंदगी) आहे. ऋतुस्त्रावामध्ये स्त्रियांपासून दूर[२] रहा आणि जो पर्यंत त्या पाक (साफ) न होऊन जातील, त्यांच्याजवळ (ही) फटकू नका. हां! जेव्हा त्या पाक (साफ) होऊन जातील[३], तर त्यांच्या जवळ जा; जेथून तुम्हाला अल्लाहतआलाने परवानगी दिली[४] आहे. अल्लाह तौबा (पश्चाताप) करणाऱ्यांना आणि पाक (साफ) रहाणाऱ्यांना पसंत करतो (२२२)**

१) मुश्रिका स्त्रियांनी अभिप्रेत मूर्तींची पूजा करणाऱ्या स्त्रिया आहेत. कारण ग्रंथधारी लोकांच्या (यहूदी आणि खिस्ती) स्त्रियांशी लग्न करण्याची परवानगी कुरआनाने दिली आहे. तथापि कोण्या मुसलमान स्त्रीचे लग्न ग्रंथधारी पुरूषाबरोबर होऊ शकत नाही. असे असताना सुद्धा, काही कारणपरत्वे (मसलेहतन्) ह.उमर ﵁ नी. ग्रंथधारी लोकांच्या स्त्रियांशी लग्न करणे नापसंद केले आहे. (इब्ने कसीर) या महावाक्यांत ईमानवाल्यांना विश्वासू पुरूष आणि स्त्रियांशी लग्नाची ताकीद करण्यात आली आहे आणि धर्माला दृष्टीआड करून केवळ सौंदर्याच्या आधारावर लग्न करण्याला परलोकाची बर्बादी ठरविण्यात आले आहे. ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धा नबी ﷺ नी म्हटले की, ''स्त्रियांशी चार कारणांने लग्न करण्यांत येते. १) धनदौलत २) वंश खानदान ३) रूप सौंदर्य किंवा ४) धर्माच्या कारणाने. तुम्ही दीनदार स्त्रीची निवड करा.'' (सहीह बुखारी) याप्रमाणे आपण ﷺ नी नेक (पुण्यवान) स्त्रीला दुनियाची सर्वांत चांगली संपत्ती (पुंजी) ठरविले आहे. (सहीह मुस्लीम)

२) वयांत आल्यानंतर प्रत्येक स्त्रीला ऋतुस्त्रावात रक्त जाते याला 'हैज़' म्हणतात. आणि कधी कधी (मासिक ऋतुस्त्रावाशिवाय) आजारामुळे रक्त जाते, याला 'इस्तहाज़ा' म्हणतात. ज्याचा आदेश 'हैज' पेक्षा वेगळा आहे. 'हैज' च्या दिवसांत स्त्रीला नमाज माफ आहे. आणि उपवास ठेवण्याला मनाई आहे. तथापि रोजाची 'कजा' नंतर जरूरी आहे. पुरूषाला संभोग मना आहे; तथापि चुंबन,आलिंगन 'जाएज' आहे. याचप्रमाणे स्त्री या दिवसांत स्वयंपाक करणे आणि दुसरी घरांतली कामे करू शकते. परंतु यहूद्यांमध्ये या दिवसांमध्ये स्त्रीला बिल्कुल घाणेरडी (नजस) समजण्यात येते. असे तिच्याशी मेळमिलाप आणि खाणे पिणे पण योग्य समजत नसत. सहाबा कराम ﵃ नी याबाबतीत, हुजूर ﷺ ला विचारले, तेव्हा हे महावाक्य अवतरीत झाले, ज्यात फक्त संभोग करण्यापासून मज्जाव करण्यात आला; वेगळे रहाणे आणि जवळ पण न जाणे चा अर्थ फक्त संभोगाला मनाई आहे. (इब्ने कसीर वगैरे)

३) जेव्हा त्या पाक (साफ) होऊन जातील, याचे दोन अर्थ सांगण्यात आले आहेत,''एक रक्त येणे बंद होऊन जाईल.'' म्हणजे मग गुसल केल्याशिवाय ही पाक आहेत. पुरूषांना त्यांच्याशी संभोग करणे जाएज आहे. इब्ने हजम व काही इमाम याचे समर्थक आहे. अल्लामा अल्बानीनेपण याचे समर्थन केले आहे. (आदाबु ज़ज़िफाफ पृ.४७) दुसरा अर्थ आहे, रक्त बंद झाल्यावर 'गुसल' (आंघोळ) करून पाक (साफ) होऊन जातील. या दुसऱ्या अर्थाच्या अनुषंगाने स्त्री जोपर्यंत गुसल् करणार नाही; तिच्याशी संभोग हराम राहील. इमाम शौकानी ने याला बेहतर (राजेह) ठरविले आहे. (फत्हुल कदीर) आमच्या मते दोन्हीही मसलक (दस्तुर) अंमल करण्यालायक आहेत परंतु दुसरा बेहतर आहे.

४) 'जेथून परवानगी दिली आहे' म्हणजे योनी मार्गाने. कारण की, ऋतुस्त्रावाच्या काळांत याचा उपयोग करण्याला मज्जाव करण्यात आला होता. आणि आता पाक (साफ) झाल्यानंतर जी परवानगी दिली जात आहे, तर याचा अर्थ याच योनी मार्गाची परवानगी आहे आणि दुसऱ्या भागाची नाही. यावरून हा पण आधार घेण्यात आला की, स्त्रीच्या पार्श्वभागाचा उपयोग हराम आहे. जशी की हदीसमध्ये याचे आणखी स्पष्टीकरण करूण देण्यात आले आहे.

نِسَآؤُكُمْ حَرْثٌ لَّكُمْ ۖ فَأْتُوا حَرْثَكُمْ أَنَّىٰ شِئْتُمْ ۖ وَقَدِّمُوا لِأَنفُسِكُمْ ۚ وَاتَّقُوا اللَّهَ وَاعْلَمُوا أَنَّكُم مُّلَاقُوهُ ۗ وَبَشِّرِ الْمُؤْمِنِينَ ﴿٢٢٣﴾

**तुमच्या पत्न्या तुमची शेती आहे. आपल्या शेतीत ज्या प्रकारे इच्छाल[१] (त्याप्रकारे) या आणि आपल्यासाठी पुढची (म्हणजे पुण्याची) व्यवस्था ठेवा. आणि अल्लाहला भीत रहा. आणि लक्षात असू द्या की, तुम्ही त्याला भेटणार आहांत. आणि ईमानवाल्यांना (विश्वासूंना) खुषखबरी ऐकवून द्या.** ﴿२२३﴾

وَلَا تَجْعَلُوا اللَّهَ عُرْضَةً لِّأَيْمَانِكُمْ أَن تَبَرُّوا وَتَتَّقُوا وَتُصْلِحُوا بَيْنَ النَّاسِ ۗ وَاللَّهُ سَمِيعٌ عَلِيمٌ ﴿٢٢٤﴾

**आणि अल्लाहतआलाला आपल्या शपथांचा अशा प्रकारे निशाना करू नका, की भलाई आणि अल्लाहला भिऊन वागणे (परहेजगारी) आणि लोकांमध्ये आपसात समेट घडवून आणण्याला, सोडून बसाल[२]. आणि अल्लाहतआला ऐकणारा व जाणणारा आहे** ﴿२२४﴾

لَّا يُؤَاخِذُكُمُ اللَّهُ بِاللَّغْوِ فِي أَيْمَانِكُمْ وَلَٰكِن يُؤَاخِذُكُم بِمَا كَسَبَتْ قُلُوبُكُمْ ۗ وَاللَّهُ غَفُورٌ حَلِيمٌ ﴿٢٢٥﴾

**अल्लाहतआला तुम्हाला त्या शपथांवर पकडणार नाही, ज्या पक्क्या नसतील[३]. हां! परंतु त्याची पकड त्या(शपथा) वर आहे, ज्या तुमच्या मनापासून असतील, अल्लाहतआला पश्चात्ताप मान्य करणारा आणि दयार्द्र आहे.** ﴿२२५﴾

لِّلَّذِينَ يُؤْلُونَ مِن نِّسَائِهِمْ تَرَبُّصُ أَرْبَعَةِ أَشْهُرٍ ۖ فَإِن فَاءُوا فَإِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿٢٢٦﴾

**जे लोक आपल्या पत्नीजवळ न जाण्याची शपथ घेऊन बसतील, त्यांना चार महिन्यांची मुदत[४] आहे. मग जर ते (या शपथेपासून) परत फिरतील तर, अल्लाहतआलापण क्षमाकर्ता व दयाळू आहे** ﴿२२६﴾

१) यहूद्यांचा विचार होता की, स्त्रीला पोटावर निजवून सहवास केला तर मूल तिरळे (भिंगा) जन्माला येईल. याच्या खंडनार्थ सांगण्यात येत आहे की, सहवास पुढून करा (चित् झोपवून) किंवा पाठीमागून (पोटावर झोपवून) किंवा एका बाजूवर झोपवून, ज्या प्रकारे इच्छाल जाएज (योग्य) आहे. परंतु हे आवश्यक आहे की, कुठल्याही अवस्थेत स्त्रीच्या योनीचाच वापर केला जावा. काही लोक याच्याने अशी दलील घेतात की, (ज्याप्रमाणे इच्छाल) मध्ये तर पार्श्वभाग पण येतो. पार्श्वभागाचा उपयोग पण योग्य आहे. परंतु हे साफ चुकीचे आहे. जेव्हा कुरआनाने स्त्रीला शेती (सारखे) ठरविले आहे, तर याचा स्पष्ट अर्थ हा आहे की, फक्त शेतीच्या उपयोगासाठी हे सांगण्यात येत आहे की, ''आपल्या शेतीत जसे इच्छाल तसे या.'' आणि ही शेती (संततीप्राप्ती) फक्त योनीमार्ग आहे. पार्श्वभाग नाही, हरहालमध्ये हे अनैसर्गिक काम आहे. याला हदीसमध्ये मुलांमध्ये बदकर्म करणे आणि अशा माणसाला जो आपल्या स्त्रीच्या पार्श्वभागाचा उपयोग करतो 'मलऊन' (धिक्कार केलेला) ठरविण्यात आले आहे. (इब्ने कसीर फत्हुल कदीरच्या हवाल्याने)

२) म्हणजे रागात अशी शपथ घेऊ नका की, मी अमक्या बरोबर भलाई करणार नाही, अमक्याशी बोलणार नाही. अमक्याच्या दरम्यान (सुलह) तडजोड घडवून आणणार नाही. अशा प्रकारच्या शपथांसाठी हदीसमध्ये सांगण्यात आले आहे की, अशी शपथ घ्याल तर तिला तोडून टाका आणि शपथ घेण्याचे प्रायश्चित्त करून (कफ्फारा) द्या. (शपथेच्या प्रायश्चित्तासाठी पहा सू.माइद: म. वा ८९ )

३) म्हणजे जो इरादा केल्याशिवाय किंवा सवयीनुसार असेल, तथापि जाणून बुजून खोटी शपथ खाणे (कबीरा) मोठा गुनाह आहे.

४) 'ईला' चा अर्थ शपथ खाण्याचा आहे; म्हणजे कोणी पती, जर शपथ खाईल की, आपल्या पत्नी बरोबर एक महिना किंवा दोन महिने संबंध ठेवणार नाही. प्रत्येक शपथेची मुदत पूर्ण करून संबंध प्रस्तापित करून घेतो. तर काही प्रायश्चित्त (कफ्फारा) नाही. हां! परंतु जर मुदत पूर्ण होण्याच्यापूर्वी संबंध प्रस्तापित करेन, तर शपथ तोडल्याचे प्रायश्चित्त करून कफ्फारा दयावा लागेल. आणि जर चार महिन्याच्या मुदतीपेक्षा जास्त किंवा मुदतीच्या शिवाय शपथ खातो, तर या महावाक्यात अशा लोकांसाठी मुदत ठरवून देण्यात आली आहे की, तो चार महिने झाल्यानंतर एक तर त्याने पत्नीशी संबंध प्रस्तापित करून घ्यावा किंवा मग तिला तलाक देऊन टाकावा (त्याला चार महिन्यांपेक्षा जास्त असेच अधांतरीत लटकवून ठेवण्याची परवानगी नाही.) पहिल्या प्रकारांत त्याला शपथेचे कफ्फारा दयावा लागेल आणि जर दोन्ही प्रकारातून कुठलाही प्रकार अंगिकारणार नाही. तर न्यायालय त्याला दोनपैकी कुठलीही एक गोष्ट मान्य करण्याला भाग पाडील की,त्याने तिच्याशी संबंध प्रस्तापित करावा; किंवा तलाक द्यावा म्हणजे पत्नीवर जुलूम होणार नाही (तफसीरे इब्ने कसीर)

**टीप:-** कफ्फारा म्हणजे केलेल्या पापाचे प्रायश्चित्त करून धर्मशास्त्राने निर्धारित केलेली शिक्षा पूर्ण करणे.

وَاِنْ عَزَمُوا الطَّلَاقَ فَاِنَّ اللّٰهَ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿٢٢٧﴾

**आणि जर तलाकचाच इरादा करून घेईल(१), तर अल्लाहतआला ऐकणारा आणि जाणणारा आहे (२२७)**

وَالْمُطَلَّقٰتُ يَتَرَبَّصْنَ بِاَنْفُسِهِنَّ ثَلٰثَةَ قُرُوْٓءٍ ؕ وَلَا يَحِلُّ لَهُنَّ اَنْ يَّكْتُمْنَ مَا خَلَقَ اللّٰهُ فِيْٓ اَرْحَامِهِنَّ اِنْ كُنَّ يُؤْمِنَّ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ ؕ وَبُعُوْلَتُهُنَّ اَحَقُّ بِرَدِّهِنَّ فِيْ ذٰلِكَ اِنْ اَرَادُوْٓا اِصْلَاحًا ؕ وَلَهُنَّ مِثْلُ الَّذِيْ عَلَيْهِنَّ بِالْمَعْرُوْفِ ۪ وَلِلرِّجَالِ عَلَيْهِنَّ دَرَجَةٌ ؕ وَاللّٰهُ عَزِيْزٌ حَكِيْمٌ ﴿٢٢٨﴾ ع

**तलाक मिळालेल्या स्त्रियांशी स्वत:ला तीन मासिकपाळीपर्यंत थांबवून ठेवावे(२). त्यांना हे विहीत (हलाल) नाही की अल्लाहने त्यांच्या गर्भाशयात जे निर्माण केले आहे, त्याला लपवावे(३). जर त्यांचे अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान असेल, त्यांचे पती या मुदतीत त्यांना परतवून घेण्याचे पूर्ण हक्कदार आहे, जर त्यांचा इरादा सुधारणा करण्याचा असेल(४), आणि स्त्रियांना पण तसेच हक्क आहेत, जसे धर्मशास्त्रानुसार त्यांच्यावर पुरुषांचे आहेत(५). हां! पुरुषांना स्त्रियांवर श्रेष्ठत्व आहे आणि अल्लाहतआला सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. (२२८)**

२८ ع ७ १२

اَلطَّلَاقُ مَرَّتٰنِ ۪ فَاِمْسَاكٌۢ بِمَعْرُوْفٍ اَوْ تَسْرِيْحٌۢ بِاِحْسَانٍ ؕ وَلَا يَحِلُّ لَكُمْ اَنْ تَاْخُذُوْا مِمَّآ اٰتَيْتُمُوْهُنَّ شَيْـًٔا اِلَّآ اَنْ يَّخَافَآ اَلَّا يُقِيْمَا حُدُوْدَ اللّٰهِ ؕ فَاِنْ خِفْتُمْ اَلَّا يُقِيْمَا حُدُوْدَ اللّٰهِ ۙ فَلَا جُنَاحَ عَلَيْهِمَا فِيْمَا افْتَدَتْ بِهٖ ؕ تِلْكَ حُدُوْدُ اللّٰهِ فَلَا تَعْتَدُوْهَا ۚ وَمَنْ يَّتَعَدَّ حُدُوْدَ اللّٰهِ فَاُولٰٓئِكَ هُمُ الظّٰلِمُوْنَ ﴿٢٢٩﴾

**तलाक दोन(६) वेळा आहे. मग एक तर भलाईच्या बरोबर थांबवून(७) ठेवणे किंवा चांगल्या तऱ्हेने सोडून देणे(८) आहे. आणि हे तुम्हाला हलाल नाही की जे काही त्यांना देऊन टाकले असेल, याच्यातून (काही सुद्धा) परत घ्यावे हां! ही वेगळी गोष्ट आहे की, दोघांना अल्लाहतआलाच्या बांधीव मर्यादा (हदे) कायम न ठेवण्याची भीती असेल, यासाठी जर तुम्हाला भय असेल की दोघे अल्लाहच्या मर्यादा कायम ठेवू शकणार नाही, तर स्त्री सुटका करून घेण्यासाठी काही देवून टाकेल, यात दोघांवर काही गुनाह नाही(९). या अल्लाहच्या बांधीव मर्यादा आहेत. खबरदार! याच्यापुढे जाऊ नका; आणि जे लोक अल्लाहच्या मर्यादेचे उल्लंघन करतील ते जालिम आहेत (२२९)**

فَاِنْ طَلَّقَهَا فَلَا تَحِلُّ لَهٗ مِنْۢ بَعْدُ حَتّٰى تَنْكِحَ زَوْجًا غَيْرَهٗ ؕ فَاِنْ طَلَّقَهَا فَلَا جُنَاحَ عَلَيْهِمَآ اَنْ يَّتَرَاجَعَآ اِنْ ظَنَّآ اَنْ يُّقِيْمَا حُدُوْدَ اللّٰهِ ؕ وَتِلْكَ حُدُوْدُ اللّٰهِ يُبَيِّنُهَا لِقَوْمٍ يَّعْلَمُوْنَ ﴿٢٣٠﴾

**मग जर तिला तलाक देऊन टाकेन तर मग आता ती त्याच्यासाठी हलाल नाही; जोपर्यंत ती स्त्री त्याच्याशिवाय दुसऱ्याशी निकाह करणार नाही. मग जर तोपण तिला तलाक देऊन टाकील तर त्या दोघांना (पुन्हा) मेळ मिलाप करून घ्यायला काहीही गुनाह नाही(१०); या अटीवर की, ते जाणून घेतील की, अल्लाहच्या बांधीव मर्यादा ते कायम ठेऊ शकतील. या अल्लाहतआलाच्या बांधीव मर्यादा (हुदुद) आहेत; ज्यांना तो (लोकांच्या) समजण्यासाठी वर्णन करून सांगत आहे. (२३०)**

१) या शब्दांनी ठाऊक होते की, चार महिने गेल्यावर लगेच खुदबखुद तलाक होणार नाही. (जसा अहनाफ वगैरेचा मसलक आहे.) परंतु पतीच्या तलाक दिल्यानेच तलाक होईल. ज्यावर त्याला न्यायालय भाग पाडील. जसा की धर्मपंडितांच्या मोठ्या समूहाचा (जम्हूरच्या) मसलक आहे. (इब्ने कसीर)

२) याच्याने ती तलाकप्राप्त स्त्री अभिप्रेत आहे, जी गर्भवती नसेल, कारण गर्भवती स्त्रीची इद्दत, गर्भ बाहेर पडून जाण्यापर्यंत आहे. जिला समागम होण्याच्यापूर्वीच तलाक मिळाला असेल. आणि तीपण नसावी  कारण की, तिची काही इद्दतच नाही. आअिसा पण नसावी. म्हणजे ज्यांना ऋतुस्त्राव येणे बंद झाले असेल. कारण की, यांची इद्दत तीन महिने आहे. जणू येथे वर्णन केलेल्या स्त्रियांशिवाय फक्त मदखुला (ती स्त्री जिच्याशी समागम केला गेला असेल) स्त्रीची इद्दत वर्णन करण्यात येत आहे आणि ती आहे तीन कुरूअ. ज्याचा अर्थ तुहर (म्हणजे तो काळ, ज्यात ऋतुस्त्राव येत नसेल) किंवा तीन मासिक पाळींची आहे. म्हणजे तुहर किंवा तीन मासिक पाळ्या, मुदत घालवून ती दुसऱ्या ठिकाणी लग्न करण्यात 'मजाज' आहे (म्हणजे तिला अखत्यार आहे.) सलफने म्हणजे पूर्वीच्या काळांतील लोकांनी 'कुरूअचे' दोन्ही अर्थ बरोबर ठरविले आहे. म्हणून दोहोंचीपण शक्यता आहे. (इब्ने कसीर, फत्हुल कदीर)

३) याच्याने ऋतुस्त्राव आणि गर्भ दोन्हीही अभिप्रेत आहेत. ऋतुस्त्राव लपवू नये. उदाहरणार्थ तिने म्हणावे की, मला तलाक नंतर एक किंवा दोन मासिक पाळ्या आल्या आहेत, वास्तविक तिला तिन्ही मासिक पाळ्या येऊन चुकल्या असाव्या. उद्देश पहिल्या पतीकडे रुजुअ करण्याचा असेल, (जर तो रुजुअ करण्याला तयार असेल) आणि जर ती रूजुअ करू इच्छित नसेल ते हे सांगून टाकावे की, मला तर तीन मासिक पाळ्या आल्या आहेत. जेव्हा की, वास्तविक असे नसेल, कारण पतीचा रूजुअ करण्याचा हक्क सिद्ध न होऊ शकावा. याचप्रमाणे गर्भाला पण लपविले न जावे; कारण की,

अशाप्रकारे दुसऱ्या ठिकाणी लग्न करण्याच्या स्थितीत वंशात सरमिसळ (अिखतलात) होऊन जाईल. बीज (नुत्तफा) हे पहिल्या पतीचे असेल आणि (मनसुब) त्याचा संबंध दुसऱ्या पतीशी जोडला जाईल. हा फार (सख्त) कबीरा गुनाह आहे.
४) रुजुअ करण्याने पतीचा उद्देश जर त्रास देण्याचा नसेल, तर इद्दतच्या आत पतीला रुजुअ करून घेण्याचा पूर्ण हक्क प्राप्त आहे. स्त्रीच्या देखभाल करणाऱ्याला (वलीला) यांच्यांत अडथळा आणण्याची परवानगी नाही.
५) म्हणजे दोघांचे अधिकार (हुकुक) एक दुसऱ्याशी मिळते जुळते आहेत. ज्यांना पूर्ण करण्याला शरीअत प्रमाणे दोघेही बांधिलदार आहेत; तथापि पुरूषाला स्त्रीवर श्रेष्ठत्त्व किंवा वरचढत्त्व प्राप्त आहे. उदाहरणार्थ प्राकृतिक शक्तीमध्ये, जिहादच्या परवानगीमध्ये, वारसाहक्कात दुप्पट होण्यांत, व्यवस्थेची जबाबदारी निभविण्यात, (कव्वामिअत) हुकूमत करण्यात (हाकीमियत) आणि तलाक व रुजुअ करण्याच्या हक्कांत. (वगैरे)
६) म्हणजे तो तलाक, ज्यांत पतीला (इद्दतच्या आत) रूजुअ करण्याचा हक्क प्राप्त आहे. तो दोन वेळा आहे. पहिल्या वेळी तलाकच्या नंतरपण आणि दुसऱ्या वेळी तलाकच्या नंतरपण रुजुअ करू शकतो. तिसऱ्या वेळी, तलाक दिल्यानंतर रुजुअ करण्याची परवानगी नाही. अज्ञान काळात हा तलाक देण्याचा आणि रूजुअ करण्याचा हक्क अनियंत्रित (गैरमहदुद) होता. ज्यामुळे स्त्रीवर मोठा अत्याचार होत असे. पुरुष वारंवार तलाक देऊन रुजुअ करीत राही. अशाने तो तिला न नांदू देत असे, न मुक्त करीत असे. अल्लाहने या अत्याचाराचा मार्ग बंद करून टाकला आणि पहिल्या आणि दुसऱ्यावेळी विचार करण्याला आणि चिंतन करण्याच्या सवलतीपासून वंचित्पण केले नाही. नाहीतर जर पहिल्या वेळच्या तलाकमध्ये हमेशासाठी ताटातुटीचा आदेश देण्यात आला असता, तर यामुळे निर्माण होणाऱ्या सामाजिक प्रश्नांच्या गुंतागुंतीचा अंदाजच करता आला नसता. याशिवाय अल्लाहतआलाने 'तल्लकतान' (दोन तलाक) म्हटले नाही परंतु, ''अत्तलाको मर्रतान'' (तलाक दोन वेळेला) म्हटले ज्यामुळे या गोष्टीकडे इशारा करण्यात आला की, एका वेळेला दोन किंवा तीन तलाक देणे आणि त्यांना एकाच वेळी, जारी (नाफीज) करणे, अल्लाहच्या हिकमत विरूद्ध आहे. अल्लाहची मन्शा या गोष्टीचा तकाजा करते की, एक वेळा तलाक नंतर मग तो एक असो किंवा कित्येक आणि अशाचप्रकारे दुसऱ्यावेळा तलाकच्या नंतर मग तो एक असो किंवा कित्येक, पतीला विचारविनिमय करण्याला आणि उतावळेपणा किंवा रागाच्या भरांत केल्या गेलेल्या कामाचे निरसन करण्याची संधी दिली जावी. हे शहाणपण (हिकमत) एका बैठकीतील तीन तलाकांना एक तलाके रजअी, ठरविण्यानेच बाकी रहाते. जसा की मुहद्देसीन आणि सलफ सालेहीन अहलेहदीस चा मज़हब आहे. तिघांना एकाचवेळी जारी करून (नाफीज) विचार करण्याला, आणि चुकीची दुरूस्ती करण्याच्या सवलतीपासून वंचित करून देण्याच्या पद्धतीत जसा की, अहनाफ आणि इतर मजाहिबचा मसलक (दस्तुर) आहे. स्पष्टीकरणासाठी कृपया पाहवे, ''मकालात इलमियह् बाबत एक मजलीसमे तीन तलाक'' आणि, ''इख्तलाफे उम्मत और सिराते मुस्तकिम'' (तालीफ मौ. सगीर अहमद शागीफ बिहारी) मध्ये आणि लेखकाचे ''मसला तलाके सलासा'' जमीमा - ३ पृष्ठ क्र.- ८५८
७) म्हणजे रुजुअ करून चांगल्या प्रकारे तिला वसविणे.
८) म्हणजे तिसऱ्या वेळा तलाक देऊन.
९) यात 'खुलाअ' (म्हणजे मेहर माफ करून किंवा मोबदला देऊन तलाक घेणे) चे वर्णन आहे. म्हणजे स्त्री, पुरूषापासून वेगळी राहू इच्छित असेल तर अशावेळी पती आपल्या स्त्रीकडून त्याने दिलेला मेहर परत घेऊ शकतो. पती जर पत्नीने वेगळे होण्याला कबूल करण्यांस तयार नसेल, तर न्यायालय पतीला तलाक देण्याचा हुकूम देईल. आणि जर तो त्याला मान्य करणार नाही, तर न्यायालय निकाहाला रद्द (फस्ख) करून टाकीन. म्हणजे 'खुल्अ' तलाकमुळे सुद्धा होऊ शकतो आणि फस्ख (रद्द) करूनपण होऊ शकतो. दोन्ही प्रकारांत 'अिद्दत' एक मासिकपाळी आहे. (अबुदाऊद तिर्मिजी, निसाई व हाकीम -फत्हुल कदीर) स्त्रीला हा हक्क देण्याबरोबरच या गोष्टीची पण सख्त ताकीद करण्यात आली की, स्त्रीने कुठल्याही योग्य कारणाशिवाय वेगळे होण्याची म्हणजे तलाकची मागणी करू नये. जर असे करेल तर नबी ﷺ नी अशा स्त्रियांसाठी ही सख्त तंबी दिली आहे की, त्या स्वर्गाचा सुवासपण घेऊ शकणार नाही. (इब्ने कसीर वगैरे)
१०) या तलाकने तिसरा तलाक अभिप्रेत आहे. म्हणजे तिसऱ्या तलाकनंतर पती आता न रुजुअ करू शकतो, न निकाह करू शकतो तथापि ही स्त्री कोण्या दुसऱ्या ठिकाणी निकाह करून घेईल. आणि दुसरा पती आपल्या मर्जीने तिला तलाक देऊन टाकेल. किंवा तो मृत्यू पावेल, तर याच्यानंतर पहिल्या पतीशी तिचा निकाह जाएज होईल. परंतु यासाठी आमच्या देशांत जी 'हलाला' ची पद्धत चालू आहे, हे फिटकारलेले कृत्य आहे. नबी ﷺ नी हलाला करणाऱ्यांवर आणि करवून घेण्यावर फिटकार केली आहे. (तिरमिझी, निसाई) हलालाच्या उद्देशाने केलेला निकाह, निकाह नाही. व्याभिचार आहे. या निकाहने स्त्री पहिल्या पतीसाठी हलाल होणार नाही.

وَإِذَا طَلَّقْتُمُ النِّسَآءَ فَبَلَغْنَ اَجَلَهُنَّ فَاَمْسِكُوْهُنَّ
بِمَعْرُوْفٍ اَوْ سَرِّحُوْهُنَّ بِمَعْرُوْفٍ وَّلَا تُمْسِكُوْهُنَّ
ضِرَارًا لِّتَعْتَدُوْا ۚ وَمَنْ يَّفْعَلْ ذٰلِكَ فَقَدْ ظَلَمَ نَفْسَهٗ ؕ
وَلَا تَتَّخِذُوْٓا اٰيٰتِ اللّٰهِ هُزُوًا ۫ وَّاذْكُرُوْا نِعْمَتَ
اللّٰهِ عَلَيْكُمْ وَمَآ اَنْزَلَ عَلَيْكُمْ مِّنَ الْكِتٰبِ
وَالْحِكْمَةِ يَعِظُكُمْ بِهٖ ؕ وَاتَّقُوا اللّٰهَ وَاعْلَمُوْٓا اَنَّ
اللّٰهَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿٢٣١﴾

जेव्हा तुम्ही स्त्रियांना तलाक द्याल आणि जेव्हा त्या आपली इद्दत पूर्ण करण्यावर येतील. तेव्हा त्यांना आता चांगल्याप्रकारे वसवा. किंवा भलाईसह त्यांना वेगळे करून द्या[१]. आणि त्यांना त्रास देण्याच्या उद्देशाने जुलूम व अत्याचार करण्यासाठी थांबवून ठेऊ नका. जो मनुष्य असे करेल, त्याने आपल्या जीवावर जुलूम केला. तुम्ही अल्लाहच्या आदेशांना हंसीखेळ बनवू नका[२]. आणि अल्लाहचा उपकार जो तुमच्यावर आहे, त्याची आठवण करा. आणि जे काही पुस्तक आणि ज्ञान त्याने अवतरीत केले आहे, ज्याने तुम्हास उपदेश करीत आहे, त्यालापण आणि अल्लाहतआलाला भीत रहा आणि लक्षात असू द्या की, अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीला जाणतो (२३१)

وَإِذَا طَلَّقْتُمُ النِّسَآءَ فَبَلَغْنَ اَجَلَهُنَّ
فَلَا تَعْضُلُوْهُنَّ اَنْ يَّنْكِحْنَ اَزْوَاجَهُنَّ اِذَا تَرَاضَوْا
بَيْنَهُمْ بِالْمَعْرُوْفِ ؕ ذٰلِكَ يُوْعَظُ بِهٖ مَنْ كَانَ
مِنْكُمْ يُؤْمِنُ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ ؕ ذٰلِكُمْ اَزْكٰى
لَكُمْ وَاَطْهَرُ ؕ وَاللّٰهُ يَعْلَمُ وَاَنْتُمْ لَا تَعْلَمُوْنَ ﴿٢٣٢﴾

आणि जेव्हा तुम्ही आपल्या स्त्रियांना तलाक द्याल आणि त्या आपली इद्दत पुरी करून घेतील, तर त्यांना त्यांच्या पतीशी लग्न करण्यात मज्जाव करू नका, जेव्हा ते आपसांत दस्तूर प्रमाणे सहसंमत (रजामंद) असतील[३]. हा उपदेश त्यांना केला जातो, ज्यांना तुमच्यापैकी अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर विश्वास आणि ईमान असेल. यांत तुमच्यासाठी उत्कृष्ठ सफाई आणि पावित्र्य आहे. अल्लाहतआला जाणतो आणि तुम्ही जाणत नाही. (२३२)

وَالْوَالِدٰتُ يُرْضِعْنَ اَوْلَادَهُنَّ حَوْلَيْنِ كَامِلَيْنِ
لِمَنْ اَرَادَ اَنْ يُّتِمَّ الرَّضَاعَةَ ؕ وَعَلَى الْمَوْلُوْدِ لَهٗ
رِزْقُهُنَّ وَكِسْوَتُهُنَّ بِالْمَعْرُوْفِ ؕ لَا تُكَلَّفُ نَفْسٌ
اِلَّا وُسْعَهَا ۚ لَا تُضَآرَّ وَالِدَةٌ ۢ بِوَلَدِهَا وَلَا مَوْلُوْدٌ
لَّهٗ بِوَلَدِهٖ ۗ وَعَلَى الْوَارِثِ مِثْلُ ذٰلِكَ ۚ فَاِنْ
اَرَادَا فِصَالًا عَنْ تَرَاضٍ مِّنْهُمَا وَتَشَاوُرٍ فَلَا
جُنَاحَ عَلَيْهِمَا ؕ وَاِنْ اَرَدْتُّمْ اَنْ تَسْتَرْضِعُوْٓا
اَوْلَادَكُمْ فَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ اِذَا سَلَّمْتُمْ مَّآ اٰتَيْتُمْ
بِالْمَعْرُوْفِ ؕ وَاتَّقُوا اللّٰهَ وَاعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ بِمَا
تَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ﴿٢٣٣﴾

आईनी आपल्या संततीला संपूर्ण दोन वर्षे दूध पाजावे; ज्यांचा इरादा दूध पाजण्याची मुदत बिलकुल पूर्ण करण्याचा असेल आणि[४] ज्यांची ती मुले असतील, त्यांच्यावर त्यांची (म्हणजे आईची) अन्न व वस्त्राची जबाबदारी आहे; जो दस्तूरप्रमाणे असावा[५]. प्रत्येक माणसावर तेवढाच बोझ टाकला जावा जेवढी त्याची ताकद असेल, आईला तिच्या मुलासाठी किंवा बापाला त्याच्या संततीसाठी काही त्रास (जरर) न दिला जावा[६]. वारसावर पण अशीच जबाबदारी[७] आहे. मग जर दोघे (म्हणजे आईबाप) आपल्या राजीखुषीने आणि आपसातल्या सल्ला मसलतीने दूध सोडवू इच्छितील, तर दोहोंवर काही गुनाह नाही आणि जर तुमचा इरादा आपल्या संततीला दूध पाजविण्याचा असेल, तरीही तुमच्यावर काही गुनाह नाही. जेव्हा की, तुम्ही दस्तुराप्रमाणे जे द्यावयाचे असेल ते त्यांच्या हवाली करून टाकावे[८]. अल्लाहतआलाला भीत रहा. आणि जाणून असा की, अल्लाहतआला तुमच्या कर्मांची देखभाल करीत आहे (२३३)

(१) 'अत्तलाकु मर्रतान' मध्ये सांगण्यात आले होते की, दोन तलाकपर्यंत रुजुअ करण्याचा अधिकार आहे. या महावाक्यात सांगण्यात येत आहे की, इद्दतच्या आतच 'रुजुअ' होऊ शकतो. इद्दत पूर्ण झाल्यानंतर नाही.

(२) काही लोक थट्टेमध्ये तलाक देऊन टाकतात; किंवा निकाह करून घेतात. किंवा मुक्त करून देतात. मग सांगतात की, मी तर थट्टे थट्टेत केले होते. अल्लाहतआलाने या महावाक्याबरोबर याला थट्टामस्करी ठरविले; ज्याचा उद्देश याला थांबविणे आहे. याच करीता नबी ﷺ नी म्हटले की, थट्टेने सुद्धा कोणी वरील कामे करील तर ते वास्तविकच समजले जाईल आणि थट्टेचा तलाक किंवा निकाह किंवा मुक्तता जारी होऊन जाईल (तफसीर इब्ने कसीर, अबुदाऊद, तिरमिझी, इब्नेमाजा)

(३) यांत तलाक दिलेल्या स्त्रीसंबंधी,एक तिसरा हुकूम देण्यात येत आहे, तो हा की, इद्दतपूर्ण झाल्यानंतर (पहिल्या किंवा दुसऱ्या तलाकनंतर) पूर्वीचे पती पत्नी आपसातल्या राजीखुषीने दुसऱ्यांदा निकाह करू इच्छीतील, तर तुम्ही त्यांना अडवू नका. नबी ﷺ च्या जमान्यात एक असा प्रसंग घडला, तर स्त्रीच्या भावाने नकार दिला. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (सहीह बुखारी, इब्ने कसीरच्या हवाल्याने) यावरून एक तर हे ठाऊक झाले की, स्त्री आपला निकाह

करू शकत नाही, तिच्या निकाहसाठी सरपरस्ताची (वली) परवानगी आणि संमती जरूरी आहे. तेव्हाच तर अल्लाहतआलाने सरपरस्तांना (वलींना) आपला सरपरस्तीचा हक्क चुकीच्या पद्धतीने वापरण्याला मना केले आहे. याचे आणखी समर्थन नबी ﷺ च्या हदीसीने होते, ''वलीच्या परवानगी शिवाय निकाह नाही.'' (इब्ने कसीर, अबुदाऊद, तिरमिझी, इब्नेमाजा, स. बुखारी, स.मुस्लिम) दुसऱ्या हदीसीप्रमाणे, ''ज्या स्त्रीने वलीच्या परवानगी शिवाय निकाह करून घेतला, तर तिचा निकाह रद्द आहे. तिचा निकाह रद्द आहे, तिचा निकाह रद्द आहे....' आणि ही गोष्ट ठाऊक झाली की, स्त्रियांच्या वलींनापण स्त्रीवर जबरदस्ती करण्याची परवानगी नाही, परंतु त्यांच्यासाठी आवश्यक आहे की, त्यांनी स्त्रीच्या रजामंदीला पण जरूर विचारत घ्यावे. (मलहुजा) जर वलीने स्त्रीच्या रजामंदीशिवाय निकाह करून दिला तर शरिअतने स्त्रीला इस्लामी न्यायालय (दारूल कज़ा)च्या माध्यमाने निकाह फस्क (रद्द) करण्याचा अधिकार दिला आहे. म्हणून आवश्यक आहे की निकाहमध्ये दोघांचीही रजामंदी असली पाहिले. कोणीही एकट्याव्यक्तीने आपली मनमानी करू नये. जर स्त्रीने मनमानीपणाने वलीच्या परवानगीशिवाय निकाह केला तर तो निकाह होणारच नाही. आणि जर वली बळजबरी करेन तर न्यायालय त्या वलीला आपल्या अधिकारांपासून वंचित करून टाकील. आणि जवळच्या वलीमार्फत अथवा स्वतः न्यायाधीश वली बनून निकाह करून देतील. हदीसमध्ये आहे की, ''जर वली आपसांत भांडत असतील तर मुस्लिमांच्या जमातचा अमीर त्या स्त्रीचा वली आहे, ज्याचा कोणीही वली नाही, भांडणाने अभिप्रेत असे भांडण आहे जो बालिग (प्रौढ) मुलीच्या निकाहमध्ये अडथळा बनून जावे. अशा प्रसंगी काझी परिस्थितीचा आढावा (जायजा) घेईल आणि निर्दयी वलीला त्याच्या अधिकारांपासून वंचित करून स्वतः निकाह करून देण्याचे कार्य पार पाडील. परंतु कोण्याही काझीचा केवल या कारणाने मुलगी प्रौढ आहे म्हणून मुलीचा फैसला (राय) बापाच्या मुकाबल्यात खरा आहे, मुलीच्या बाजूने फैसला करून देणे चूकीचे आहे. जसे की आजकाल बरेचसे न्यायालये करत आहेत. न्यायालयांना दयाळू आणि भलाई करणाऱ्या पालकांना त्यांच्या अधिकारांपासून वंचित करण्याचा अधिकार नाही, जो अधिकार शरीअतने त्यांना दिला आहे.

(४) येथे दूध पाजण्यासंबंधी वर्णन करण्यात आले आहे. यात पहिले ही गोष्ट सांगण्यात आली आहे की, जी स्त्री दूध पाजण्याची मुदत पूर्ण करू इच्छिल, तर तिने २ वर्षे पूर्ण दूध पाजावे. या शब्दांनी यापेक्षा कमी मुदतीसाठी दूध पाजण्याची शक्यता पण निघते. दुसरी गोष्ट ही माहित झाली की, दूध पाजण्याची मुदत जास्तीत जास्त दोन वर्षे आहे. जसे की तिर्मिझी मध्ये ह.उुम्मे सलमा ﵂ कडून मर्‌फूअ रिवायत आहे की, ''तेच दूध पाजणे हुरमत सिद्ध करते , जे छातीतून निघून आतड्यांना फाडेल आणि हे दूध सोडविण्याच्या मुदतपूर्वी असेल.'' (तिर्मिझी) याप्रमाणे या मुदतीच्या आंत कोणी मूल कोण्या स्त्रीचे अशाप्रकारे दूध पिऊन घेईल. ज्याच्याने दूध पाजणे सिद्ध होते. तर त्यांच्या दरम्यान दूध पाजण्याचे नाते कायम होऊन जाईल. ज्यामुळे रजाई बहीण भावांमध्ये आपसांत निकाह अशाप्रकारे हराम होईल; ज्याप्रमाणे सख्या बहीण भावांमध्ये हराम होतो. ''दूध पाजण्याने सुद्धा ते नातेसंबध हराम होऊन जातील, जे वंशाने (नसबसे) हराम होतात.'' (सहीह बुखारी)

(५) 'मौलुदुललहु' ने अभिप्रेत बाप आहे. तलाक होऊन गेल्यानंतर दूध पिती मुले आणि त्याच्या आईच्या जिम्मेदारीचा (किफालत) मसला आमच्या समाजात मोठा बिकट होऊन जातो. आणि याचे कारण धर्मशास्त्राकडून फिरून जाणे आहे. जर अल्लाहच्या हुकूमाप्रमाणे पती आपल्या कुवतीनुसार तलाक दिलेल्या स्त्रीच्या अन्नवस्त्राला जबाबदार राहील, ज्याप्रमाणे या महावाक्यांत सांगण्यात येत आहे, तर फारच सोप्या रितीने ही समस्या सुटून जाते.

(६) आईला त्रास देणे हे आहे की, उदाहरणार्थ, आई आपल्या मुलाला आपल्याजवळ ठेवू इच्छिल; परंतु वात्सल्याच्या भावनेला दृष्टीआड करून मूल,जबरदस्तीने तिच्याकडून हिसकावण्यांत यावे, किंवा खर्चाशिवाय जबाबदारी उचलावी, तिला दूध पाजण्याला भाग पाडले जाते. बापाला त्रास देण्याचा अर्थ हा आहे की, आईने दूध पाजण्याला नकार द्यावा, किंवा त्याच्या कुवतीपेक्षा जास्त त्याच्याकडे आर्थिक मागणी करावी.

(७) बापाच्या मृत्यूनंतर ही जबाबदारी त्याच्या वारसांवर आहे. की त्यांनी मुलाच्या आईचे हक्क योग्यप्रकारे अदा करावेत. की ज्यामुळे न स्त्रीला त्रास व्हावा, न मुलाचे पालनपोषण व सांभाळ करण्यावर त्याचा परिणाम व्हावा.

(८) ही आईशिवाय दुसऱ्या कोण्या स्त्रीकडून दूध पाजवण्याची परवानगी आहे; या अटीवर की याचा मोबदला दस्तुराप्रमाणे अदा केला जावा.

وَالَّذِينَ يُتَوَفَّوْنَ مِنكُمْ وَيَذَرُونَ أَزْوَاجًا يَتَرَبَّصْنَ بِأَنفُسِهِنَّ أَرْبَعَةَ أَشْهُرٍ وَعَشْرًا فَإِذَا بَلَغْنَ أَجَلَهُنَّ فَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ فِيمَا فَعَلْنَ فِي أَنفُسِهِنَّ بِالْمَعْرُوفِ وَاللَّهُ بِمَا تَعْمَلُونَ خَبِيرٌ ﴿٢٣٤﴾

**तुमच्यातून जे लोक मरण पावतील आणि पत्न्या (मागे) सोडून जातील, त्या स्त्रिया आपल्या स्वत:ला चार महिने दहा दिवस इद्दतमध्ये ठेवतील(१). मग जेव्हा मुदत पूर्ण करून घेईल, तर जे चांगल्याप्रकारे त्या आपल्या करीता करतील, त्यात तुमच्यावर काही गुनाह नाही(२). आणि अल्लाहतआला तुमच्या प्रत्येक कर्मापासून माहितगार आहे** ﴿२३४﴾

وَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ فِيمَا عَرَّضْتُم بِهِ مِنْ خِطْبَةِ النِّسَاءِ أَوْ أَكْنَنتُمْ فِي أَنفُسِكُمْ عَلِمَ اللَّهُ أَنَّكُمْ سَتَذْكُرُونَهُنَّ وَلَٰكِن لَّا تُوَاعِدُوهُنَّ سِرًّا إِلَّا أَن تَقُولُوا قَوْلًا مَّعْرُوفًا وَلَا تَعْزِمُوا عُقْدَةَ النِّكَاحِ حَتَّىٰ يَبْلُغَ الْكِتَابُ أَجَلَهُ وَاعْلَمُوا أَنَّ اللَّهَ يَعْلَمُ مَا فِي أَنفُسِكُمْ فَاحْذَرُوهُ وَاعْلَمُوا أَنَّ اللَّهَ غَفُورٌ حَلِيمٌ ﴿٢٣٥﴾

**तुमच्यावर याच्यात काही पाप नाही की, तुम्ही इशाऱ्याने या स्त्रियांना निकाहच्या बाबतीत सांगावे किंवा आपल्या मनांत गुप्त इरादा करावा. अल्लाहतआलाला याचे ज्ञान आहे की, तुम्ही जरूर त्यांच्याशी उल्लेख कराल, परंतु तुम्ही त्यांच्याशी गुप्त वायदे करू नका(३). हां! ही दुसरी गोष्ट आहे तुम्ही भली गोष्ट बोलत जा(४). आणि निकाहचा इरादा पक्का करू नका, जोपर्यंत इद्दत पूर्ण होणार नाही. हे लक्षांत ठेवा की अल्लाहतआलाला तुमच्या मनांतील गोष्टीचे पण ज्ञान आहे. तुम्ही त्याला भीत रहा. आणि हे पण लक्षात ठेवा की, अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयार्द्र आहे** ﴿२३५﴾

(१) ही मृत्यूनंतरची इद्दत प्रत्येक स्त्रीसाठी आहे. मग ती समागम झालेली असो अथवा समागम न झालेली असो, तरूण असो किंवा म्हातारी, तथापि यांच्यातून गर्भवती स्त्री अपवाद आहे; कारण तिची इद्दत गर्भाच्या बाहेर पडण्यापर्यंत आहे. ''गर्भवती स्त्रीची इद्दत गर्भ बाहेर पडण्यापर्यंत आहे.'' (सू. अत्तलाक महावाक्य - ४) या मृत्यूनंतरच्या इद्दतीत स्त्रीला साज शृंगाराची (येथ पावेतो की सुरमा लावण्याची पण) आणि पतीच्या घरातून कुण्या दुसऱ्या ठिकाणी स्थलांतर होण्याची परवानगी नाही. तथापि रजई तलाक दिलेल्या स्त्रीला साज श्रृंगार करण्याला मनाई नाही. आणि तलाक बाइना मिळालेल्या स्त्रीच्या बाबतीत मतभेद आहेत. काही श्रृंगार करण्याला, आणि काही न करण्याच्या मताचे आहेत (इब्ने कसीर)

(२) म्हणजे इद्दत संपल्यानंतर त्यांनी साजशृंगार करावा आणि वलीच्या परवानगीने आणि सल्ला मसलतीने दुसऱ्या कोण्या जागी निकाह करण्याचा बंदोबस्त करावा. तर याच्यात काही आक्षेपार्ह नाही. यासाठी तुमच्यावर सुद्धा (हे स्त्रियांच्या वलींनो!) काही गुनाह नाही. याच्यावरून ठाऊक झाले की, दुसऱ्या विवाहाला वाईट समजले जाऊ नये; तसेच त्यांच्यात अडथळा आणला जाऊ नये.

(३) हे विधवा, किंवा ती स्त्री जिला तीन तलाक मिळून चुकले असतील किंवा तलाके बाइना, यांच्या बाबतीत सांगितले जात आहे की, इद्दतच्या दरम्यान त्यांच्याशी इशाऱ्याने तुम्ही निकाहचा संदेश देऊ शकतात. (उदा.माझा विचार लग्न करण्याचा आहे किंवा मी नेक स्त्रीच्या शोधात आहे वगैरे) परंतु त्यांच्याशी गुप्त वायदा करू नका. आणि इद्दत संपण्यापूर्वी लग्न करण्याचे पण पक्के करू नका परंतु त्या स्त्रीला जिला पतीने एक किंवा दोन तलाक दिले असतील, तिला इद्दतच्या मुदतीच्या आत इशाऱ्याने निकाहचा पैगाम देणे योग्य नाही. कारण जोपर्यंत इद्दत संपत नाही. तोपर्यंत तिच्यावर तिच्या नवऱ्याचाच हक्क आहे. शक्यता आहे की, पती कदाचित् रुजुअ करून घेईल.

**मसला** : काही वेळा असे सुद्धा होते की, अडाणी लोक इद्दतच्या आतच निकाह करून घेतात. याच्याबाबतीत हुकूम हा आहे की, जर त्यांच्यात समागम झाला नसेल, तर ताबडतोब त्यांना विभक्त करण्यात यावे. आणि जर समागम झाला असेल, तरी सुद्धा विभक्त करणे जरूरीचे आहे. तथापि दुसऱ्यांदा त्यांच्या दरम्यान (इद्दत संपल्यानंतर) निकाह होऊ शकतो का नाही? यात मतभेद आहेत. काही उल्मांचे मत आहे की, त्यांच्यात आता सुद्धा निकाह होऊ शकत नाही. हे एक दुसऱ्यासाठी कायम स्वरूपी हराम आहेत. परंतु उल्मांची एक मोठी संख्या, यांच्या दरम्यान निकाह करण्याच्या पक्षातले आहेत.

(४) याच्याने अभिप्रेत तोच इशारा आहे, ज्याचा हुकूम पहिले देण्यात आला आहे. उदा. तुझ्या बाबतीत (मी) इच्छा बाळगतो किंवा वलीला सांगावे की, तिच्या निकाहच्या बाबतीत निर्णय करण्यापूर्वी मला जरूर कळवावे; वगैरे (इब्ने कसीर)

لَاجُنَاحَ عَلَيۡكُمۡ اِنۡ طَلَّقۡتُمُ النِّسَآءَ مَا لَمۡ تَمَسُّوۡهُنَّ اَوۡ تَفۡرِضُوۡا لَهُنَّ فَرِيۡضَةً ۖۚ وَّمَتِّعُوۡهُنَّ عَلَى الۡمُوۡسِعِ قَدَرُهٗ وَعَلَى الۡمُقۡتِرِ قَدَرُهٗ ۚ مَتَاعًا ۢ بِالۡمَعۡرُوۡفِ ۚ حَقًّا عَلَى الۡمُحۡسِنِيۡنَ ﴿۲۳۶﴾

जर तुम्ही स्त्रियांना हात लावल्याशिवाय आणि महर निश्चित केल्याशिवाय तलाक देऊन टाकाल, तरी पण तुमच्यावर काही पाप नाही. हां! परंतु त्यांना काही ना काही फायदा द्या. समृद्धलोक आपल्या ऐपतीप्रमाणे आणि गरीब असलेले आपल्या कुवतीनुसार दस्तुराप्रमाणे चांगला फायदा द्यावा. भलाई करणाऱ्यांवर हे आवश्यक आहे[१] (२३६)

وَاِنۡ طَلَّقۡتُمُوۡهُنَّ مِنۡ قَبۡلِ اَنۡ تَمَسُّوۡهُنَّ وَقَدۡ فَرَضۡتُمۡ لَهُنَّ فَرِيۡضَةً فَنِصۡفُ مَا فَرَضۡتُمۡ اِلَّاۤ اَنۡ يَّعۡفُوۡنَ اَوۡ يَعۡفُوَا الَّذِىۡ بِيَدِهٖ عُقۡدَةُ النِّكَاحِ ؕ وَاَنۡ تَعۡفُوۡۤا اَقۡرَبُ لِلتَّقۡوٰى ؕ وَلَا تَنۡسَوُا الۡفَضۡلَ بَيۡنَكُمۡ ؕ اِنَّ اللّٰهَ بِمَا تَعۡمَلُوۡنَ بَصِيۡرٌ ﴿۲۳۷﴾

आणि जर तुम्ही स्त्रियांना याच्यापूर्वीच तलाक देऊन टाकाल की, तुम्ही त्यांना हात लावला असेल, आणि तुम्ही त्याचा मेहरपण निश्चित केला असेल, तर निश्चित केलेल्या मेहरपैकी अर्धीमेहर देऊन द्या ही वेगळी गोष्ट आहे की, त्या माफ करून देतील[२] किंवा त्या माणसाने माफ करून द्यावे, ज्याच्या हातांत लग्नाची गाठ आहे[३]. तुमचे माफ करून देणे ईशभयाच्या फार जवळ आहे आणि आपसांतल्या श्रेष्ठत्वाला आणि मोठेपणाला विसरून जाऊ नका. खचितच् अल्लाहतआला तुमच्या कर्मांना पहात आहे (२३७)

(१) हा त्या स्त्रीच्या बाबतीत हुकूम आहे की, निकाहच्या वेळी तिची मेहर निश्चित झाली नव्हती. आणि पतीने समागमाशिवाय तलाकपण देऊन टाकला, तर तिला काही ना काही फायदा पोहचवून निरोप द्या. हा फायदा प्रत्येक माणसाच्या कुवतीनुसार असावयास पाहिजे. समृद्ध आपल्या ऐपतीप्रमाणे आणि अडचणीत असलेला आपल्या कुवतीनुसार देईल. तथापि भलाईचा बर्ताव करणाऱ्यांवर हे आवश्यक आहे. हा फायदा देण्याच्या मालमत्तेला निश्चित पण करण्यात आले आहे. कोणी सांगितले एक सेवक कोणी म्हटले ५०० दिरहम, कोणी एक किंवा काही सुट वगैरे. तथापि ही निश्चिती शरिअतकडून नाही. प्रत्येक माणसाला आपल्या कुवतीप्रमाणे देण्याचे आदेश आणि अधिकार आहे. यात ही मतभेद आहेत की, तलाकवर देण्याची मालमत्ता सर्व प्रकारच्या तलाकप्राप्त स्त्रियांसाठी आहे? किंवा त्या विशिष्ट स्त्रीबाबत आदेश आहे ज्याचा या महावाक्यात अल्लेख आहे. कुरआनाच्या काही महावाक्यांनी माहित होते की, हे सर्व प्रकारच्या तलाकप्राप्त स्त्रीसाठी आहे. वल्लाह् आलम. या माल देण्याच्या हुकूमांत जी हिकमत (बुद्धीमत्ता) आणि फायदे आहेत, त्यांचे स्पष्टीकरण करण्याची गरज नाही. ताणतणाव, मलाल (कमीपणा वाटणे) आणि मतभेद जे तलाकाचे कारण असते, उपकार करणे, स्त्रीची मनधरणी करणे, दिलदार वृत्ती दाखविण्याची व्यवस्था करणे, भविष्यातील लढाई झगड्याचे द्वार बंद करण्याचे अत्यंत महत्वाचे साधन आहे. परंतु आमच्या समाजांत या उपकार व चांगल्या वागणूकीऐवजी तलाकप्राप्त स्त्रीला अशा वाईट प्रकारे निरोप देण्यात येतो की, दोन्ही कुटुंबातील आपसातील संबंध नेहमीसाठी संपून जातात.

(२) हा दुसरा प्रकार आहे की, समागमापूर्वीच तलाक दिला असेल आणि मेहरपण निश्चित केलेली असेल, या अवस्थेत पतीला हे जरुरी आहे की, अर्धी मेहर त्याने अदा करावी. किंवा स्त्रीने आपला हक्क माफ करून टाकला असावा. या स्थीतीत पतीला काहीही द्यावे लागणार नाही.

(३) याच्याने अभिप्रेत पती आहे, कारण लग्नगांठ, याचे तोडणे आणि बाकी ठेवणे त्याच्या हातात आहे. अर्धी मेहेर माफ करून टाकेन, म्हणजे अदा केलेल्या मेहरमधून अर्धी मेहेर परत घेण्याऐवजी आपला हा हक्क (अर्धी मेहेर) माफ करून टाकेल आणि पूर्णचा पूर्ण मेहेर स्त्रीला देऊन टाकेल. याच्यापुढे आपसांत कृपा आणि उपकाराला न विसरण्याची ताकीद करून मेहेरच्या हक्कात सुद्धा याच कृपा आणि उपकाराला अंगिकारण्याची प्रेरणा देण्यात आली आहे.

**मुलाहेजा** : काहींनी 'बियदीही उकदतुन् निकाह' ने स्त्रीचा वली असा अर्थ घेतला आहे की, स्त्रीने माफ करून टाकावी किंवा तिच्या वलीने माफ करून टाकावी. परंतु हे बरोबर नाही. एक तर स्त्रीच्या वलीच्या हातात लग्नगांठ नाही; दुसरे असे की मेहेर हा स्त्रीचा हक्क आणि तिची संपत्ती आहे. तिला माफ करण्याचा हक्कपण वलीला प्राप्त नाही. म्हणून तेच भाष्य बरोबर आहे, जे सुरूवातीला केले गेले आहे (फत्हुल कदीर)

**आवश्यक खुलासा** : तलाक मिळालेल्या स्त्रियांचे चार प्रकार आहेत.

१) ज्यांची मेहेरपण निश्चित केली आहे. पतीने समागम पण केलेला आहे. त्यांना मेहेरचा पूर्ण हक्क दिला जाईल. जशी की सू. बक़र: महावाक्य २२१ मध्ये याचा तपशील आहे. २) मेहेरपण निश्चित केलेला नाही; समागमपण केला गेला नाही; त्यांना फक्त मुताए तलाक् दिला जाईल. ३) मेहेर निश्चित करण्यात आली आहे; पण समागम करण्यात आला नाही. त्यांनी अर्धी मेहेर देणे आवश्यक आहे ( या दोहोंची तपशील सध्या नजरेखाली असलेल्या महावाक्यात आहे) ४) समागम केला गेला आहे; पण मेहेर निश्चित केलेला नाही. त्यांच्यासाठी 'मेहेरमिस्ल' आहे. मेहेरमिस्ल चा अर्थ, त्या स्त्रीच्या समाजांत (कौम) जो रिवाज आहे. किंवा तिच्याच सारख्या स्त्रीसाठी सर्वसाधारण जी मेहेर निश्चित केली जात असेल. (नैलुल अवतार व औनुल मअबूद)

حٰفِظُوْا عَلَى الصَّلَوٰتِ وَالصَّلٰوةِ الْوُسْطٰى ۗ وَقُوْمُوْا لِلّٰهِ قٰنِتِيْنَ ﴿٢٣٨﴾

नमाजींचे संरक्षण करा; खास करून मधल्या नमाजीची[१] आणि अल्लाहतआलाकरीता अत्यादराने उभे रहात जा (२३८)

فَاِنْ خِفْتُمْ فَرِجَالًا اَوْ رُكْبَانًا ۚ فَاِذَآ اَمِنْتُمْ فَاذْكُرُوا اللّٰهَ كَمَا عَلَّمَكُمْ مَّا لَمْ تَكُوْنُوْا تَعْلَمُوْنَ ﴿٢٣٩﴾

आणि जर तुम्हास भय असेल तर पायीपायीच किंवा स्वारीवरच हां! पण जेव्हा शांती प्रस्तापित होऊन जाईल, तर अल्लाहचे. स्मरण करा, ज्याप्रमाणे त्याने तुम्हाला याचे शिक्षण दिले आहे, ज्याला (पूर्वी) तुम्ही जाणत नव्हता[२]. (२३९)

وَالَّذِيْنَ يُتَوَفَّوْنَ مِنْكُمْ وَيَذَرُوْنَ اَزْوَاجًا ۖۚ وَّصِيَّةً لِّاَزْوَاجِهِمْ مَّتَاعًا اِلَى الْحَوْلِ غَيْرَ اِخْرَاجٍ ۚ فَاِنْ خَرَجْنَ فَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ فِيْ مَا فَعَلْنَ فِيْٓ اَنْفُسِهِنَّ مِنْ مَّعْرُوْفٍ ۗ وَاللّٰهُ عَزِيْزٌ حَكِيْمٌ ﴿٢٤٠﴾

जे लोक तुमच्यातून मरण पावतील आणि (मागे) पत्न्या सोडून जातील, त्यांनी वसियत (मृत्यूपत्र) करून जावे की, त्यांच्या पत्न्यांना वर्षभर फायदा दिला जावा[३]. त्यांना कोणी बाहेर काढू नये हां! जर त्या स्वत: निघून जातील, तर तुमच्यावर यांत काहीही गुनाह नाही, जे ते आपल्यासाठी भलाईने करतील; अल्लाहतआला सामर्थ्यवान आणि बुद्धीवान आहे (२४०)

وَلِلْمُطَلَّقٰتِ مَتَاعٌ ۢ بِالْمَعْرُوْفِ ۗ حَقًّا عَلَى الْمُتَّقِيْنَ ﴿٢٤١﴾

तलाक दिलेल्या स्त्रियांना चांगल्याप्रकारे फायदा पोहचवणे, अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांवर आवश्यक आहे[४] (२४१)

كَذٰلِكَ يُبَيِّنُ اللّٰهُ لَكُمْ اٰيٰتِهٖ لَعَلَّكُمْ تَعْقِلُوْنَ ﴿٢٤٢﴾ ع ٣١/١٥

३१ ع १५ अल्लाहतआला अशाचप्रकारे आपली महावाक्ये तुम्हांवर जाहीर करीत राहिला आहे; की (कदाचित्) तुम्ही समजाल (२४२)

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْنَ خَرَجُوْا مِنْ دِيَارِهِمْ وَهُمْ اُلُوْفٌ حَذَرَ الْمَوْتِ ۠ فَقَالَ لَهُمُ اللّٰهُ مُوْتُوْا ۗ ثُمَّ اَحْيَاهُمْ ۗ اِنَّ اللّٰهَ لَذُوْ فَضْلٍ عَلَى النَّاسِ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا يَشْكُرُوْنَ ﴿٢٤٣﴾

काय तुम्ही त्यांना पाहिले नाही, जे हजारोंच्या संख्येत होते ? आणि मृत्यूच्या भीतीने आपल्या घरातून निघून पडले होते. अल्लाहतआलाने त्यांना आदेश दिला की मरून जा, मग त्यांना जिवंत करून दिले[५]. नि:संशय अल्लाहतआला लोकांवर फारच कृपानिधान आहे; परंतु बहुतेक लोक कृतघ्न आहेत (२४३)

وَقَاتِلُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ وَاعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿٢٤٤﴾

अल्लाहच्या मार्गात धर्मयुद्ध करा; आणि जाणून असा की, अल्लाहतआला ऐकणारा आणि जाणणारा आहे (२४४)

مَنْ ذَا الَّذِيْ يُقْرِضُ اللّٰهَ قَرْضًا حَسَنًا فَيُضٰعِفَهٗ لَهٗٓ اَضْعَافًا كَثِيْرَةً ۗ وَاللّٰهُ يَقْبِضُ وَيَبْصُۜطُ ۠ وَاِلَيْهِ تُرْجَعُوْنَ ﴿٢٤٥﴾

असाही कोणी आहे जो अल्लाहतआलाला चांगले कर्ज[६] देईल ? मग अल्लाहतआला त्याला अनेकपटीने वाढवून (परत) देईल. अल्लाहच तंगदस्ती आणि विपुलता करतो. आणि तुम्ही सर्व त्याच्याचकडे परतून जाणार आहांत (२४५)

اَلَمْ تَرَ اِلَى الْمَلَاِ مِنْۢ بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ مِنْۢ بَعْدِ مُوْسٰى ۘ اِذْ قَالُوْا لِنَبِيٍّ لَّهُمُ ابْعَثْ لَنَا مَلِكًا نُّقَاتِلْ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ۗ قَالَ هَلْ عَسَيْتُمْ اِنْ كُتِبَ عَلَيْكُمُ الْقِتَالُ اَلَّا تُقَاتِلُوْا ۗ قَالُوْا وَمَا لَنَآ اَلَّا نُقَاتِلَ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ وَقَدْ اُخْرِجْنَا مِنْ دِيَارِنَا وَاَبْنَآئِنَا ۗ فَلَمَّا كُتِبَ عَلَيْهِمُ الْقِتَالُ تَوَلَّوْا اِلَّا قَلِيْلًا مِّنْهُمْ ۗ وَاللّٰهُ عَلِيْمٌ ۢ بِالظّٰلِمِيْنَ ﴿٢٤٦﴾

काय तुम्ही ह. मूसा (अ) च्या नंतरच्या बनी इस्राईलच्या जमातीला पाहिले नाही[७]? जेव्हा त्यांनी आपल्या पैगंबरांना सांगितले की, कोणाला आमचा बादशहा बनवून द्या; की आम्ही अल्लाहच्या मार्गात जिहाद करावे[८]. पैगंबरांनी सांगितले की, शक्यता आहे, जिहाद फर्ज (अनिवार्य) झाल्यानंतर तुम्ही जिहाद न करावे. त्यांनी म्हटले, आम्ही अल्लाहच्या मार्गात जिहाद का करणार नाही? आम्ही तर घरातून काढले गेलो आहोत आणि मुलाबाळांपासून दूर करण्यात आलो आहोत. मग जेव्हा त्यांच्यावर जिहाद फर्ज (अनिवार्य) केले गेले, तर थोड्याशा लोकांशिवाय सर्व फिरून गेले आणि अल्लाहतआला जालीमांना खूप जाणून आहे (२४६)

१) मधल्या वेळच्या नमाजीने असरची नमाज अभिप्रेत आहे. जिला रसूल ﷺ च्या त्या हदीसमध्ये निश्चित करून दिले, ज्यांत आपण ﷺ नी खंदकाच्या दिवशी असरच्या नमाजीला, ''सलाते वुस्ता'' ठरविले. (सहीह बुखारी ह.क्र.४५३३, मुस्लीम ४३७)

२) म्हणजे शत्रूपासून भयाचे वेळी ज्याप्रमाणेही शक्य आहे, पायी चालत असता, स्वारीवर बसले असतांना नमाज पढून घ्या. तथापि जेव्हा भयाची स्थिती संपून जाईल, मग तशी नमाज पढा, जशी शिकवली गेली आहे.

३) हे महावाक्य जरी कुरआनात क्रमशः नंतर लिहिलेले आहे तरी पण रद्द (मन्सुख) झालेले आहे. रद्द करणारे

महावाक्य पहिले येऊन चुकले आहे. ज्यात मृत्यूनंतरची इद्दत ४ महिने १० दिवस दाखविण्यात आली. तथापि विरसा संबंधीत महावाक्यात पत्न्यांचा हिस्सापण ठरवून देण्यात आला आहे. म्हणून आता पतीला पत्नी करता कुठलीही वसियत (मृत्यूपत्र) करण्याची जरूरी राहिली नाही न राहण्याची व न अन्न वस्त्राची.

४) हा सर्वसाधारण आदेश आहे जो प्रत्येक तलाक मिळालेल्या स्त्रीला लागू आहे. यांत ताटातुटीच्या वेळी ज्या सद्व्यवहाराचा आणि मनधरणीचा अवलंब करण्याची ताकीद केली गेली आहे, याच्यात बरेच कौटुंबिक फायदे आहेत. अरेरे ! मुसलमान या फारच महत्त्वाच्या उपदेशावर अंमलबजावणी करते, तर किती चांगले झाले असते. ज्याला ते बिलकुल विसरून गेले आहेत. आजकालच्या काही धर्मसुधारकांनी 'मताअ' व 'मत्तीऊहून्ना' ने यासाठी आधार घेतला आहे की, तलाक दिलेल्या स्त्रीला आपल्या संपत्तीतून बाकायदा हिस्सा द्या किंवा जिंदगीभर अन्न वस्त्र (खावटी) देत रहा. या दोन्ही गोष्टी काही पाया नसलेल्या गोष्टी आहेत. ज्या स्त्रीला पतीने फारच नावडती समजून आपल्या जीवनातून काढून टाकले. तो सारी हयातीभर तिच्या खर्चपाण्याच्या अदा करण्याला कसे बरा तयार होईल?

५) ही घटना पूर्वीच्या कुण्या उम्मतची आहे. ज्याचा तपशील कोण्या सहीह हदीसमध्ये करण्यांत आलेला नाही. भाष्यांच्या उल्लेखांत इला बनी इस्राईलच्या काळांतील घटना आणि त्या पैगंबराचे नांव ज्याच्या प्रार्थनेने (दुआ) त्यांना, अल्लाहतआलाने दुसऱ्यांदा जिवंत केले, 'हिजकील' सांगण्यात येते. हे युद्धांत मारल्या जाण्याच्या भीतीने किंवा संसर्ग आजार प्लेगच्या भीतीने, आपल्या घरातून निघून पडले होते की, मृत्यूच्या जाळ्यात जाण्यापासून वाचून जावे. अल्लाहतआलाने त्यांना मारून हे दाखविले की, अल्लाहच्या तकदीरने वाचून तुम्ही कोठे जाऊ शकत नाही. दुसरे असे की, मानवांचे शेवटचे आश्रयस्थान अल्लाहतआलाचीच जात आहे. तिसरे असे की, अल्लाहतआला दुसऱ्यांदा जिवंत करण्यात सर्वसमर्थ आहे. आणि सर्व माणसांना अशाप्रकारे जिवंत करीन, ज्याप्रमाणे अल्लाहने यांना मारून जिवंत केले. पुढच्या महावाक्यात मुसलमानांना जिहादचा हुकूम देण्यांत येत आहे. याच्यापूर्वी या घटनेच्या वर्णनात हेच दर्शविण्यांत येत आहे की, जिहादपासून पळ काढू नका; मृत्यू आणि जीवन तर अल्लाहच्या अखत्यारीत (कब्जात) आहे. आणि या मृत्यूचा वेळ पण ठरलेला आहे. जिहाद पासून पळ काढून तुम्ही याला (मृत्यूला) टाळू शकत नाही.

६) करजे हसनाने अभिप्रेत अल्लाहच्या मार्गात आणि जिहादमध्ये माल खर्च करणे आहे. म्हणजे प्राणाप्रमाणे आर्थिक त्यागाला, टाळाटाळ करू नका. उपजिवीकेची विपुलता आणि कमीपण अल्लाहच्या अखत्यारांत आहे. आणि तो दोहोप्रकारे तुमची कसोटी घेत असतो. कधी रोजीमध्ये कमी करून कधी विपुलता देऊन. मग अल्लाहच्या मार्गात खर्च केल्याने तर कमीपण होत नाही. अल्लाहतआला यांच्यात किती तरी पटीने वाढ करून देतो. कधी जाहीरप्रकारे, कधी वास्तवतेत कधी आत्मिक स्वरूपात यांत बरकत टाकून आणि परलोकांत तर खचितच् याची वाढ आश्चर्यचकीत करणारी असेल.

७) 'मलअ' कुण्या समाजाच्या सभ्य आणि सरदार आणि समस्यांचे निराकरण करणाऱ्यांना म्हटले जाते; जे खास सल्लामसलत देणारे आणि कायद्याचे ज्ञान असणारे असतात.ज्यांना पाहिल्यावर डोळे आणि अंतःकरण त्यांच्या रूबाबाने दिपून जाते. ('मलअ' चा शब्दकोषिय अर्थ भरून जाण्याचा आहे.) (अयसरू त्तफासीर) ज्या पैगंबराचे येथे वर्णन आहे, त्याचे नांव 'शुमुवैल' सांगण्यात येते. इब्ने कसीर वगैरे भाष्यकारांनी जी घटना वर्णन केली आहे. त्याचा खुलासा असा आहे की, बनु इस्राईल, ह. मूसा عليه السلام च्यानंतर थोड्या काळासाठी तर ठीक राहिले; मग ते धर्मापासून भटकून गेले. धर्मात बिदआत शोधून काढल्या; येथपावेतो की, मूर्तीपूजा सुरू करून दिली. पैगंबर त्यांना मना करत राहिले; परंतु ते पापाचरणापासून आणि शिर्क पासून परांङमुख झाले नाहीत. याच्या परिणामांत अल्लाहने त्यांच्या दुष्मनांना त्यांच्यावर वरचढत्व दिले. ज्यांनी त्यांचे इलाखेपण त्यांच्यापासून हिसकावून घेतले. आणि त्यांच्या एका मोठ्या संख्येला कैदीपण बनवून घेतले. त्यांच्यात पैगंबरीचा क्रमपण खंडीत झाला. शेवटी काही लोकांच्या प्रार्थनेने 'शुमुवैल' पैगंबर जन्माला आाले. ज्यांनी दावत व तबलीग (धर्माचे आवाहन व प्रचार) चे काम सुरू केले. त्यांनी पैगंबरांना अनुरोध केला की, आमच्यासाठी एक बादशाह नियुक्त केला जावा, ज्याच्या नेतृत्वाखाली आम्ही शत्रुंशी लढावे. पैगंबराने त्यांच्या पूर्वीच्या कर्तृत्वाला दृष्टीसमोर ठेऊन सांगितले की, तुम्ही मागणी तर करीत आहात; पण माझा अंदाज तर असा आहे की, तुम्ही आपल्या या गोष्टीवर कायम रहाणार नाहीत. आणि झालेही तसेच जसे की, कुरआनाने वर्णन केले आहे.

८) पैगंबराच्या उपस्थितीत बादशाह नेमण्याची मागणी बादशाह नेमणे योग्य असल्याचा पुरावा आहे. कारण की, बादशाहत योग्य नसती तर, अल्लाहतआलाने या मागणीला फेटाळून लावले असते. परंतु अल्लाहतआलाने या मागणीला रद्द केले नाही; उलट 'तालूत' ला त्यांच्यासाठी बादशाह मुकर्रर करून दिले. जसे की, पुढे येत आहे. याच्याने ठाऊक झाले की, जर बादशाह आपली मनमानी करणारा नसेल परंतु तो अल्लाहच्या आदेशांचा पाबंद (पालन करणारा) आहे. आणि न्याय करणारा आहे; तर याची बादशाहत नुसती योग्यच नाही, तर ती हवीशी आहे आणि प्रिय आहे. अधिक तपशीलासाठी पहा सू.माईदा आ. २० चा समास ६.)

وَقَالَ لَهُمْ نَبِيُّهُمْ اِنَّ اللّٰهَ قَدْ بَعَثَ لَكُمْ طَالُوْتَ مَلِكًا ؕ قَالُوْٓا اَنّٰى يَكُوْنُ لَهُ الْمُلْكُ عَلَيْنَا وَنَحْنُ اَحَقُّ بِالْمُلْكِ مِنْهُ وَلَمْ يُؤْتَ سَعَةً مِّنَ الْمَالِ ؕ قَالَ اِنَّ اللّٰهَ اصْطَفٰىهُ عَلَيْكُمْ وَزَادَهٗ بَسْطَةً فِى الْعِلْمِ وَالْجِسْمِ ؕ وَاللّٰهُ يُؤْتِىْ مُلْكَهٗ مَنْ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ وَاسِعٌ عَلِيْمٌ ﴿٢٤٧﴾

**आणि त्यांना त्यांच्या पैगंबराने सांगितले की, अल्लाहने तालूतला तुमचा बादशाह बनवून दिले आहे. तेव्हा म्हणू लागले की, त्याची आमच्यावर सत्ता कशी होऊ शकते? याच्यापेक्षातर जास्त आम्ही बादशाहतचे हक्कदार आहोत. त्याला तर आर्थिक सुबत्तापण देण्यात आलेली नाही. पैगंबराने सांगितले ऐका, अल्लाहने त्यालाच तुमच्यावर श्रेष्ठत्व दिले आहे. आणि त्याला ज्ञानाची आणि शारीरिक फारच समृद्धी (बरतरी) देण्यात आली आहे[१]. गोष्ट अशी आहे की, अल्लाह ज्याला इच्छिल त्याला आपले राज्य देईल. अल्लाहतआला (अति) उदार आणि सर्वज्ञानी आहे (२४७)**

وَقَالَ لَهُمْ نَبِيُّهُمْ اِنَّ اٰيَةَ مُلْكِهٖٓ اَنْ يَّاْتِيَكُمُ التَّابُوْتُ فِيْهِ سَكِيْنَةٌ مِّنْ رَّبِّكُمْ وَبَقِيَّةٌ مِّمَّا تَرَكَ اٰلُ مُوْسٰى وَاٰلُ هٰرُوْنَ تَحْمِلُهُ الْمَلٰٓئِكَةُ ؕ اِنَّ فِىْ ذٰلِكَ لَاٰيَةً لَّكُمْ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿٢٤٨﴾

**त्यांच्या पैगंबरांनी त्यांना मग सांगितले की, त्याच्या बादशाहतची जाहीर निशाणी ही आहे की, तुमच्याजवळ ती पेटी[२] येऊन जाईल, ज्यात तुमच्या पालनकर्त्याकडून शांती आहे. आणि मूसा (अ.) ची संतती, आणि हारून (अ.)च्या संततीच्या मागे राहिलेला तरका (वस्तू) आहेत की, देवदूत तिला उचलून आणतील. खचितच् ही तुमच्यासाठी स्पष्ट निशाणी आहे; जर तुम्ही ईमानदार (विश्वासू) आहात (२४८)**

३२ ६ १६

فَلَمَّا فَصَلَ طَالُوْتُ بِالْجُنُوْدِ ۙ قَالَ اِنَّ اللّٰهَ مُبْتَلِيْكُمْ بِنَهَرٍ ۚ فَمَنْ شَرِبَ مِنْهُ فَلَيْسَ مِنِّىْ ۚ وَمَنْ لَّمْ يَطْعَمْهُ فَاِنَّهٗ مِنِّىْٓ اِلَّا مَنِ اغْتَرَفَ غُرْفَةً ۢ بِيَدِهٖ ۚ فَشَرِبُوْا مِنْهُ اِلَّا قَلِيْلًا مِّنْهُمْ ؕ فَلَمَّا جَاوَزَهٗ هُوَ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا مَعَهٗ ۙ قَالُوْا لَا طَاقَةَ لَنَا الْيَوْمَ بِجَالُوْتَ وَجُنُوْدِهٖ ؕ قَالَ الَّذِيْنَ يَظُنُّوْنَ اَنَّهُمْ مُّلٰقُوا اللّٰهِ ۙ كَمْ مِّنْ فِئَةٍ قَلِيْلَةٍ غَلَبَتْ فِئَةً كَثِيْرَةً ۢ بِاِذْنِ اللّٰهِ ؕ وَاللّٰهُ مَعَ الصّٰبِرِيْنَ ﴿٢٤٩﴾

**जेव्हा (ह.) तालूत लष्कराला घेऊन निघाले, तर सांगितले, ऐका! अल्लाहतआला एका नदीने[३] तुमची परीक्षा घेणार आहे; ज्याने हिच्यातून पाणी पिऊन घेतले, तो माझा नाही आणि जो त्याला चाखणार पण नाही, तो माझा आहे. हां! ही वेगळी गोष्ट आहे की, आपल्या हाताने एक चूळ भरून घेईल; परंतु काही थोड्या शिवाय बाकी सर्वांनी ते पाणी पिऊन घेतले[४] ह. तालूत मोमिनांसह जेव्हा नदीपार करून गेले, तेव्हा ते लोक म्हणू लागले की, आज आमच्यात ताकद नाही की, जालूत आणि त्याच्या सैनिकांशी (आम्ही) लढावे[५]. परंतु अल्लाहतआलाच्या भेटीवर भरोसा ठेवणाऱ्यांनी म्हटले, कधी कधी एका छोट्याश्या टोळीने अल्लाहच्या हुकूमाने बड्या टोळीवर वर्चस्व गाजविले आहे. अल्लाहतआला धैर्यशील लोकांबरोबर आहे. (२४९)**

وَلَمَّا بَرَزُوْا لِجَالُوْتَ وَجُنُوْدِهٖ قَالُوْا رَبَّنَآ اَفْرِغْ عَلَيْنَا صَبْرًا وَّثَبِّتْ اَقْدَامَنَا وَانْصُرْنَا عَلَى الْقَوْمِ الْكٰفِرِيْنَ ﴿٢٥٠﴾

**जेव्हा त्यांचा जालूत आणि त्याच्या लष्कराशी मुकाबला झाला; तेव्हा त्यांनी प्रार्थना केली की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला धैर्य दे, आमचे पाय जमवून दे आणि काफिरांच्या जमातीवर आमची मदत कर[६]. (२५०)**

१) हजरत तालूत त्या वंशातून नव्हते, ज्याच्यातून बनी इस्राईलच्या बादशहांचा क्रम चालू होता. हे एक गरीब आणि सर्वसाधारण सैनिक होते, ज्यावर त्यांनी आक्षेप घेतला. पैगंबरांनी सांगितले की, ही माझी निवड नाही. अल्लाहतआलाने त्यांना नियुक्त केले आहे. शिवाय मार्गदर्शन आणि बादशाहीसाठी संपत्तीपेक्षा अक्कल व ज्ञान आणि शारीरिक बळ आणि सामर्थ्य यांची जास्त जरूरी आहे. आणि तालूत त्यांच्यात तुमच्या सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहे; याकरीता अल्लाहतआलाने त्यांना या पदासाठी निवडले आहे. तो अति उदार आणि कृपानिधान आहे. ज्याला इच्छितो त्याला आपली दया आणि देणग्याने उपकृत करीतो; 'अलीम' आहे. म्हणजे तो जाणतो की, बादशाहतचा जास्त हक्कदार कोण आहे, आणि कोण नाही (असे ठाऊक होते की, जेव्हा त्यांना सांगण्यात आले की, ही नियुक्ती अल्लाहकडून आहे, तर याच्यासाठी त्यांनी एखाद्या निशाणीची मागणी केली, की, त्यांचे पूर्णपणे समाधान होऊन जावे. म्हणून पुढच्या महावाक्यात एका आणखी निशाणीचे वर्णन आहे.)

२) पेटी म्हणजे 'ताबूत' जो 'तूब' पासून आहे. ज्याचा अर्थ पालटण्याचा आहे. कारण बनी इस्राईल बरकत मिळवण्यासाठी या पेटीकडे पालटत असत. (फत्हुल कदीर) या पेटीत ह.मूसा عليه السلام व ह.हारून عليه السلام च्या वस्तू (ज्या बरकतसाठी ठेवण्यात आल्या) होत्या. ही पेटी पण त्यांचे शत्रू त्यांच्याकडून हिसकावून घेऊन गेले होते.

अल्लाहतआलाने निशाणी म्हणून ही पेटी देवदूतांकरवी ह. तालूत ﷺ च्या दरवाजावर पोहचवून दिली. जिला पाहून बनी इस्राईल खूष पण झालेत; आणि तिला तालूतच्या बादशाहीसाठी अल्लाहकडून निशाणी पण समजले आणि अल्लाहतआलानेपण तिला तिच्यासाठी एक चमत्कार आणि विजय आणि मनशांतीचा सबब ठरविले. सकीनतचा अर्थच अल्लाहतआलाकडून खास मदतीचे असे अवतरीकरण आहे, जे तो (अल्लाह) आपल्या खास सेवकांसाठी अवतरीत करीत असतो. आणि जिच्यामुळे युद्धाच्या भयंकर रक्तपाताच्यां घमासानांत मोठमोठे शूरवीर पण थर-थर कापू लागतात. ईमानवाल्यांची अंतःकरणे शत्रूच्या भीती आणि हैबतीपासून खाली होऊन आणि विजयाच्या आशेने परीपूर्ण होऊन जातात. या घटनेने माहीत होते की, पैगंबर आणि पुण्यवान लोकांच्या वस्तू (तबर्रूकात) खचितच् अल्लाहकडून महत्त्वाचे आणि फायदा पोहचविणारे असतात. या शर्तीवर की ते खरोखरच 'तबर्रूकात' असाव्यात, ज्याप्रमाणे या पेटीत खचितच् ह.मूसा व हारून ﷺ चे 'तबर्रूकात' होते. परंतु निव्वळ खोट्या संबंधाने (निस्बत) कोणी वस्तू मुतबर्रक होऊन जात नाही. ज्याप्रमाणे आजकाल 'तबर्रूकात' च्या नावांवर पुष्कळ ठिकाणी वेगवेगळ्या वस्तू ठेवण्यात आल्या आहेत. ज्यांचा ऐतिहासिक दृष्टया काही पूर्ण पुरावा नाही. अशाप्रकारे स्वतःच्या निर्माण केलेल्या वस्तूंपासून पण काहीही प्राप्त होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे काही लोक नबी ﷺ च्या नालमुबारक (वहाणा) ची प्रतिकृती करून आपल्याजवळ बाळगणे किंवा घरांमध्ये लटकविणे किंवा विशिष्ट पद्धतीने याच्या उपयोगात आणण्याला इच्छापूर्ती आणि संकटांना दूर करण्याला याला (अकसीर) परिणाम करणारी समजतात. याचप्रमाणे कबरींवर बुजुर्गांच्या नावाची नजर व नियाजच्या वस्तूंना आणि लंगरांना (जेवण देणे) बरकतवाले समजतात. वास्तविक हा गैरूल्लाहच्या नांवावर चढावा आहे, जो शिर्कच्या घेऱ्यात येतो. याचे खाणे बिल्कुल हराम आहे. कबरींना गुस्ल देण्यात येतो. आणि त्याच्या पाण्याला बरकतवाले समजण्यात येते. वास्तविक कबरींना गुस्ल देणे पण खाना-ए-काबाच्या गुस्लची नक़्ल आहे. ज्याचा काही जवाज नाही. हे घाणेरडे पाणी कसे बरकतवाले होऊ शकते ? या सर्व गोष्टी फारच चुकीच्या आहेत. ज्यांचे काहीही मूळ धर्मशास्त्रांत नाही.

३) ही(नहर) नदी उर्दून आणि पॅलेस्टाईन यांच्या दरम्यान आहे.

४) अमीरची इताअत (आज्ञापालन) प्रत्येक स्थितीत आवश्यक आहे. तथापि शत्रूशी मोर्चे बांधणीच्या वेळी, तर याचे महत्त्व दुप्पट किंबहुना शंभरपट होऊन जाते. दुसरे असे की, युद्धात विजयासाठी हेपण जरूरी आहे की, सैनिकाने या काळांत भूक,तहान आणि दुसरे त्रास मोठ्या सहनशिलतेने आणि धैर्याने सहन करावे. म्हणून या दोन्ही गोष्टींचे प्रशिक्षण आणि परीक्षा घेण्यासाठी तालूतने सांगितले की, नदीवर तुमची पहिली कसोटी होईल. ज्याने पाणी पिऊन घेतले, त्याचा माझ्याशी काहीही संबंध राहणार नाही. परंतु या तंबीहनंतर सुद्धा कितीतरी जणांनी पाणी पिऊन घेतले. यांच्या संख्येत भाष्यकारांनी वेगवेगळे कथन केले आहेत. त्याचप्रमाणे न पिणाऱ्यांची संख्या ३१३ सांगण्यांत येते; जी असहाबे बदर ची संख्या आहे. वल्लाहु अअलम.

५) या ईमानवाल्यांनीपण सुरवातीला जेव्हा शत्रूची मोठी संख्या पाहिली आपल्या थोड्याश्या संख्येला नजरेसमोर ठेऊन, या मताला जाहीर केले. ज्यावर त्यांच्या उलमाने आणि त्यांच्यापेक्षा जास्त भरोसा राखणाऱ्यांनी सांगितले की, यश हे संख्येच्या जास्ती असण्यावर आणि शस्त्रांच्या विपुलतेवर अवलंबून नाही, किंबहुना अल्लाहच्या मर्जीवर अवलंबून आहे. आणि अल्लाहच्या पाठिंब्यासाठी धैर्याचा अवलंब करणे अत्यंत जरूरी आहे.

६) जालूत त्या शत्रू राष्ट्राचा कमांडर आणि त्यांचा सर्वेसर्वा होता, ज्याच्याशी तालूत आणि त्याच्या साथीदारांचा मुकाबला होता. हे राष्ट्र अमालिका होते. जे आपल्या काळांतील मोठे लढवय्ये आणि बहादूर राष्ट्र समजले जात होते. त्यांच्या याच प्रसिद्धीला दृष्टीसमोर ठेवून, ऐन मोर्चेबांधणीच्या वेळी ईमानवाल्यांनी अल्लाहच्या दरबारांत धैर्य आणि दृढता आणि कुफ्रच्या विरोधात ईमानाला विजय आणि सफलतासाठी प्रार्थना केली. जणू ऐहीक साजसामुग्रीच्या बरोबर ईमानवाल्यांना हे जरूरी आहे की, त्यांनी अल्लाहच्या मदतीसाठी अशावेळी, विशेष इच्छुक असावे; जसे बदरच्या लढाईच्या वेळी नबी ﷺ नी फारच व्याकुळतेने आणि नम्रतेने विजय आणि मदतीसाठी दुआ मागितली. जिला अल्लाहतआलाने कबूल केले. आणि मुसलमानांची एक अत्यंत छोटी संख्या काफिरांच्या मोठ्या संख्येवर विजयी झाली. आणि काफिरांचा धडा घेण्यासारखा पराभव झाला.

فَهَزَمُوْهُمْ بِاِذْنِ اللّٰهِ ۙ۬ وَقَتَلَ دَاوٗدُ جَالُوْتَ
وَاٰتٰىهُ اللّٰهُ الْمُلْكَ وَالْحِكْمَةَ وَعَلَّمَهٗ مِمَّا
يَشَآءُ ؕ وَلَوْلَا دَفْعُ اللّٰهِ النَّاسَ بَعْضَهُمْ بِبَعْضٍ ۙ
لَّفَسَدَتِ الْاَرْضُ وَلٰكِنَّ اللّٰهَ ذُوْ فَضْلٍ عَلَى الْعٰلَمِيْنَ ﴿٢٥١﴾

**तर अल्लाहतआलाच्या हुकूमाने त्यांनी जालूतवाल्यांचा पराभव केला. आणि ह.दाऊद कडून जालूत ठार झाला[१]. आणि अल्लाहतआलाने दाऊदला राज्य व दुरदर्शिता (हिकमत)[२] आणि जेवढे इच्छिले तेवढे ज्ञानपण दिले. जर अल्लाहतआला काही लोकांना काही लोकांकडून हटवित न राहता, तर पृथ्वीवर अनाचार माजला असता. परंतु अल्लाहतआला दुनियावाल्यांवर फारच कृपावंत आहे[३].** ﴿२५१﴾

تِلْكَ اٰيٰتُ اللّٰهِ نَتْلُوْهَا عَلَيْكَ بِالْحَقِّ ؕ وَاِنَّكَ لَمِنَ
الْمُرْسَلِيْنَ ﴿٢٥٢﴾

**ही अल्लाहतआलाची महावाक्ये आहेत. ज्यांना आम्ही सत्यपूर्ण आपणांस वाचून दाखवितो. याच्यात काही संशय नाही आपण पाठविलेल्या पैगंबरांपैकी आहात[४]** ﴿२५२﴾

(१) हजरत दाऊद عليه السلام सुद्धा जे यावेळी पैगंबर नव्हते आणि बादशाह पण नव्हते, या तालूतच्या लष्करात एक सैनिक म्हणून दाखल होते. यांच्या हस्ते अल्लाहने जालूतचा शेवट केला; आणि या थोड्याशा ईमानवाल्यांकडून एका मोठ्या राष्ट्राचा निर्णायक पराभव केला.

(२) याच्यानंतर अल्लाहतआलाने ह.दाऊद عليه السلام ला राज्यपण दिले आणि, पैगंबरीसुद्धा. हिकमतने काहींनी पैगंबरी, काहींनी लोहाराची कारागिरी, काहींनी या कामाची समझबूझ असा अर्थ घेतला आहे, जो या युद्धाच्या वेळेला अल्लाहतआलाच्या मर्जीने आणि इच्छेने निर्णायक सिद्ध झाला.

(३) यात अल्लाहच्या सुन्नते इलाहीचा (अल्लाहच्या दस्तुराचा) उल्लेख आहे की, तो माणसाच्या एका समूहाकडून दुसऱ्या माणसांच्या समूहाच्या जुलुमांचा आणि त्यांच्या सत्तेचा शेवट करीत असतो. जर त्याने असे केले नसते, आणि कुण्या एकाच समूहाला सामर्थ्य आणि अधिकार देऊन ठेवला असता, तर ही पृथ्वी जुलूम आणि अनाचाराने भरून गेली असती. म्हणून हा अल्लाहचा कायदा, जगांतील लोकांसाठी अल्लाहच्या कृपेचा विशेष आखाडा आहे. याचे वर्णन अल्लाहतआलाने सू.हजच्या आ.३८ आणि आ.४० मध्ये केले आहे.

(४) या मागील घटना ज्या हुजूर ﷺ वर अवतरीत झालेल्या पुस्तकामुळे जगाला माहित होत आहे. ''हे मोहम्मद ! ﷺ खचितच् आपल्या पैगंबरीची आणि सत्यतेची दलील आहे. कारण की आपण ﷺ हे कुठल्या पुस्तकांत वाचले नाही. आणि कोणाकडून ऐकले नाही''. ज्यामुळे हे स्पष्ट आहे की या अदृश्याच्या (गैब) बातम्या आहेत, ज्या वह्य द्वारे अल्लाहतआला आपल्यावर अवतरीत करीत आहे. कुरआन करीममध्ये अनेक ठिकाणी पूर्वी होऊन गेलेल्या उम्मतींच्या या घटना आपल्या सत्त्यतेकरीता दलील म्हणून सादर करण्यात आल्या आहेत.

تِلْكَ الرُّسُلُ فَضَّلْنَا بَعْضَهُمْ عَلٰى بَعْضٍ ۘ مِنْهُمْ مَّنْ كَلَّمَ اللّٰهُ وَرَفَعَ بَعْضَهُمْ دَرَجٰتٍ ؕ وَاٰتَيْنَا عِيْسَى ابْنَ مَرْيَمَ الْبَيِّنٰتِ وَاَيَّدْنٰهُ بِرُوْحِ الْقُدُسِ ؕ وَلَوْ شَآءَ اللّٰهُ مَا اقْتَتَلَ الَّذِيْنَ مِنْۢ بَعْدِهِمْ مِّنْۢ بَعْدِ مَا جَآءَتْهُمُ الْبَيِّنٰتُ وَلٰكِنِ اخْتَلَفُوْا فَمِنْهُمْ مَّنْ اٰمَنَ وَمِنْهُمْ مَّنْ كَفَرَ ؕ وَلَوْ شَآءَ اللّٰهُ مَا اقْتَتَلُوْا ۟ وَلٰكِنَّ اللّٰهَ يَفْعَلُ مَا يُرِيْدُ ﴿٢٥٣﴾

हे पैगंबर आहेत,ज्यातून आम्ही,काहींवर काहींना श्रेष्ठत्व दिले आहे[१]. त्यांच्यातून काही ते आहेत,ज्यांच्याशी अल्लाहतआलाने बोलणे केले आहे. आणि काहींचे दर्जे मोठे केले आहेत. आणि आम्ही ईसा बिन मर्यम (अ) ला चमत्कार दिले आणि रूहुल कुदुसने त्यांचे समर्थन[२] केले. जर अल्लाह इच्छिता तर, त्यांच्यानंतर वाल्यांनी, आपल्या जवळ दलीली (प्रमाणे) आल्यानंतर कधीच आपसात लढाई झगडे केले नसते, परंतु या लोकांनी मतभेद केला. त्यांच्यातून काहीतर मोमिन झाले (आणि) काही काफिर (झाले). आणि अल्लाहतआला इच्छिता तर हे आपसांत लढले[३] नसते. परंतु अल्लाहतआला जे इच्छितो, ते करतो ﴿२५३﴾

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَنْفِقُوْا مِمَّا رَزَقْنٰكُمْ مِّنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِىَ يَوْمٌ لَّا بَيْعٌ فِيْهِ وَلَا خُلَّةٌ وَّلَا شَفَاعَةٌ ؕ وَالْكٰفِرُوْنَ هُمُ الظّٰلِمُوْنَ ﴿٢٥٤﴾

हे ईमानवाल्यांनो! जे आम्ही तुम्हास देऊन ठेवले आहे, त्यातून खर्च करीत रहा, याच्यापूर्वी की तो दिवस येईल, ज्याच्यात ना व्यापार आहे, ना मैत्री ना शिफारस[४]; आणि काफिरच जालीम आहेत ﴿२५४﴾

اَللّٰهُ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۚ اَلْحَىُّ الْقَيُّوْمُ ۚ لَا تَاْخُذُهٗ سِنَةٌ وَّلَا نَوْمٌ ؕ لَهٗ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الْاَرْضِ ؕ مَنْ ذَا الَّذِىْ يَشْفَعُ عِنْدَهٗٓ اِلَّا بِاِذْنِهٖ ؕ يَعْلَمُ مَا بَيْنَ اَيْدِيْهِمْ وَمَا خَلْفَهُمْ ۚ وَلَا يُحِيْطُوْنَ بِشَىْءٍ مِّنْ عِلْمِهٖٓ اِلَّا بِمَا شَآءَ ۚ وَسِعَ كُرْسِيُّهُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ ۚ وَلَا يَئُوْدُهٗ حِفْظُهُمَا ۚ وَهُوَ الْعَلِىُّ الْعَظِيْمُ ﴿٢٥٥﴾

अल्लाहतआलाच खराखुरा उपास्य आहे. त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. जो जिवंत,आणि सर्वांचा सांभाळकर्ता आहे. ज्याला ना गुंगी घेरते ना निद्रा. जमीन आणि आकाशातील सर्व वस्तुंचा तो मालक आहे. कोण आहे जो त्याच्या परवानगीवाचून त्याच्या समोर शिफाअत करू शकेल? त्याला ठाऊक आहे जे यांच्यापुढे आहे, आणि जे यांच्या मागे आहे. आणि त्याच्या ज्ञाना मधून कुठलीही गोष्ट त्यांच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही, परंतु जेवढे तो इच्छेल[५]. त्याच्या महासिंहासनाच्या (कुरसी) व्याप्तीने[६] पृथ्वी आणि आकाशाला घेरून ठेवले आहे. तो अल्लाहतआला त्याच्या संरक्षणाने थकत नाही आणि कंटाळत देखील नाही. आणि तो तर खूप श्रेष्ठ आणि खूप महिमावंत आहे. ﴿२५५﴾

१) कुरआनाने एका दुसऱ्या जागी पण याचे वर्णन केलेले आहे. ''वलकद फज्जलना बाअज़न नबिय्यीना अला बअज'' आम्ही काही पैगंबरांना काही पैगंबरांवर श्रेष्ठत्व दिले आहे. (सू. बनी-इसराईल -५५) यासाठी या सत्य स्थितीत तर काही शंका नाही. अलबत्ता नबी ﷺ नी फरमाविले आहे, ''तुम्ही मला पैगंबरांवर श्रेष्ठत्व देऊ नका.'' (सही बुखारी व स. मुस्लिम) तर याच्याने एक दुसऱ्यावर श्रेष्ठत्वाचा इन्कार आवश्यक होत नाही. तथापि , या उम्मतीला पैगंबर عليهم السلام लोकांच्या बाबत आदर सन्मान शिकविण्यात आला आहे. कारण की तुम्हास सर्व गोष्टी आणि फरकाचा ज्यामुळे, त्यांना एक दुसऱ्यावर श्रेष्ठत्व प्राप्त आहे, पूर्ण ज्ञान नाही. त्यामुळे तुम्ही माझे श्रेष्ठत्व पण असे वर्णन न करा, की ज्यामुळे दुसऱ्या पैगंबरांच्या शानमध्ये कमीपणा येईल. नाहीतर काही पैगंबराचे, काहींवर श्रेष्ठत्व, आणि तमाम पैगंबरांवर, नबी ﷺ चे श्रेष्ठत्व अहले सुन्नतचा एकत्र अकिदा (श्रद्धा) आहे, जो कुरआन शरीफच्या आयातीने साफ आणि स्पष्ट आहे. (तपशिलासाठी पहा फतहुल कदीर, लिलशौकानी)

२) अभिप्रेत ते चमत्कार आहेत; जे ईसा عليه السلام ला देण्यात आले होते. उदाहरणार्थ मृतांना जिवंत करणे वगैरे. ज्यांचा तपशील सू.आले इमरान मध्ये येईल. रूहुल कुदुसने अभिप्रेत ह.जिब्रिल عليه السلام आहेत. जसे पहिले येवून चुकले आहेत.

३) या विषयाला,अल्लाहतआलाने कुरआन मजीदमध्ये कित्येक ठिकाणी वर्णन केले आहे. याचा अर्थ असा नाही कीं, अल्लाहने नाज़िल केलेल्या धर्मात,मतभेद ग्राह्य (पसंदीदा) आहे. हे अल्लाहतआलाला सख्त नापसंद आहे; त्याची पसंती ही आहे कीं, सर्व माणसांनी, त्याने अवतरीत केलेल्या धर्मशास्त्राला अंगिकारून नरकाग्नी पासून वाचून जावे. यासाठी त्याने पुस्तके उतारली. पैगंबर عليهم السلام लोकांचा पाठविण्याचा क्रम चालू ठेवला; येथपावेतो की, नबी करीम ﷺ वर पैगंबरीचा शेवट केला. परंतु त्यानंतरही खलीफा,उलेमा व दुआतच्या मार्फत सत्याचे आवाहन आणि भलाईचा हुकूम व वाईट कामांपासून थांबविणे याचा क्रम चालू ठेवण्यात आला. आणि याचे सख्त महत्त्व आणि ताकीद

करण्यात आली. कशासाठी? अशासाठी की, लोकांनी अल्लाहतआलाच्या आवडत्या मार्गाला अंगिकारावे.परंतु कारण की, त्याने मार्गदर्शन आणि मार्गभ्रष्ट होणे,दोन्ही गोष्टींची जाणिव करवून, माणसाला कोणताही एक मार्ग अंगिकारण्याला भाग पाडले नाही; उलट परीक्षा म्हणून त्याला अंगिकारण्याचे आणि विचार करण्याचे स्वातंत्र्य दिले आहे. यासाठी कोणी या हक्काचा योग्य उपयोग करून मोमिन बनतो आणि कोणी या हक्काचा आणि स्वातंत्र्यांचा चुकीचा उपयोग करून काफिर बनून जातो. ही जणू त्याची तत्त्वदर्शिता आणि मर्जी आहे. जी याच्या प्रसन्नतेपेक्षा वेगळी गोष्ट आहे.

४) यहूदी,ख्रिस्ती, काफिर आणि बहुदेववादी आपल्या आपल्या पुढारी म्हणजे पैगंबर,वली,बुजुर्ग आणि पीर वमुर्शद वगैरेच्या बाबतीत अशी श्रद्धा ठेवत होते की, अल्लाहवर त्यांचे असे वजन आहे, की ते आपल्या व्यक्तीत्त्वाच्या जोरावर आपल्या अनुयायींच्या बाबतीत, जी गोष्ट इच्छितील, ती अल्लाहकडून मान्य करवून घेऊ शकतात. आणि मान्य करवून घेतात. याला ते 'शफाअत' म्हणत असत. म्हणजे त्यांचा अकिदा (श्रद्धा) जवळ-जवळ तसाच होता, जो आजकालच्या अडानी लोकांचा आहे; की आमचे बुजुर्ग अल्लाहजवळ अडून बसतील; आणि माफी देववूनच उठतील. या महावाक्यात सांगण्यात आले आहे की, अल्लाहजवळ अशा कोण्या शफाअतचे काही अस्तित्व नाही. मग यांच्यानंतर आयतुल कुर्सी मध्ये, आणि दुसऱ्या वेगवेगळ्या महावाक्यात आणि हदीसीमध्ये सांगण्यात आले आहे की, येथे एक वेगळ्या प्रकारची शफाअत जरूर होईल. परंतु ही शफाअत ते लोक करू शकतील, ज्यांना अल्लाह परवानगी देईल. आणि फक्त त्याच सेवकांसाठी करू शकतील, ज्यांच्यासाठी अल्लाह परवानगी देईल आणि अल्लाह फक्त आणि फक्त एकेश्वरवाद्यांसाठीच (अहले तौहिद) अशी परवानगी देईल. ही शिफाअत देवदूतपण करतील. पैगंबर, हुतात्मे (शहीद) आणि पुण्यवान लोकपण. परंतु यांच्यापैकी कोणत्याही व्यक्तित्त्वाचा अल्लाहवर काही दबाव राहणार नाही. परंतु याउलट हे लोक स्वत: अल्लाहच्या भीतीने असे चळचळ कांपत असतील, त्यांचे चेहरे विवर्ण झालेले असतील. ''ते कोणाचीही सिफारिश करत नाही शिवाय त्यांच्या, ज्यांच्याशी अल्लाह खूष आहे. ते तर स्वत: अल्लाहच्या भयाने थरथर करतात.'' (सू. अलअंबिया २८)

५) ही आयतल कुर्सी आहे, जिची फजिलत सहीह अहादीसने सिद्ध आहे. उदाहरणार्थ हे महावाक्य, कुरआनाचे अज़ीम (अति उच्च, श्रेष्ठ) महावाक्य आहे. याच्या वाचल्याने रात्री शैतानापासून संरक्षण होते. प्रत्येक फर्ज नमाजीनंतर पढण्याची मोठी फजिलत आहे. वगैरे. (इब्ने कसीर) अल्लाहतआलाची वैशिष्टयपूर्ण प्रतिष्ठा,त्याच्या शानची बुलंदी, आणि त्याचे सामर्थ्य आणि महानताचे वर्णन असलेले हे एक ठोस (जामेअ) महावाक्य आहे.

६) 'कुर्सी' ने काहींनी,'मोजए कदमैन्' (पाऊल ठेवण्याची जागा) काहींनी ज्ञान,काहींनी सामर्थ्य आणि मोठेपण,काहींनी बादशाही (म्हणजे राज्य) आणि काहींनी 'अर्ष' असा अर्थ घेतला आहे. परंतु अल्लाहतआलाच्या विशेषणाच्या बाबतीत मुहद्देसीन आणि सलफ सालेहीनचा हा दस्तुर (मसलक) आहे, की अल्लाहतआलाची जी विशेषणे, ज्या प्रमाणे कुरआन आणि हदीसमध्ये वर्णन करण्यात आली आहेत, त्यांना त्यांच्या जाहीर अर्थावरून न फिरवता आणि भाष्य न करता, त्यांच्यावर ईमान आणले जावे. याकरीता असाच विश्वास ठेवला पाहिजे की, ही वास्तवात खुर्ची आहे, जी अर्षपासून वेगळी आहे. तिची वस्तुस्थिती काय आहे, तिच्यावर तो कशाप्रकारे बसतो? याला आम्ही वर्णन करू शकत नाही. कारण की याच्या अंताकडून आणि वास्तविकतेकडून आम्ही अज्ञानांत (बेखबर) आहोत.

لَآ اِكْرَاهَ فِي الدِّيْنِ ۙ قَدْ تَّبَيَّنَ الرُّشْدُ مِنَ الْغَيِّ ۚ فَمَنْ يَّكْفُرْ بِالطَّاغُوْتِ وَيُؤْمِنْ بِاللّٰهِ فَقَدِ اسْتَمْسَكَ بِالْعُرْوَةِ الْوُثْقٰى ۚ لَا انْفِصَامَ لَهَا ۗ وَاللّٰهُ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿٢٥٦﴾

धर्माच्या बाबतीत काहीही जबरदस्ती नाही. सरळ मार्ग, आडमार्गापासून वेगळा व प्रकाशमान होऊन चुकला(१) आहे. म्हणून जो मनुष्य अल्लाहतआला शिवाय दुसऱ्या उपास्यांना, नाकारून,अल्लाहतआलावर ईमान आणेल, त्याने मजबूत कड्याला धरले आहे; जे कधी तुटणार नाही;आणि अल्लाहतआला ऐकणारा आणि (सर्व काही) जाणणारा आहे. (२५६)

اَللّٰهُ وَلِيُّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا ۙ يُخْرِجُهُمْ مِّنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوْرِ ۗ وَالَّذِيْنَ كَفَرُوْٓا اَوْلِيٰٓـــُٔهُمُ الطَّاغُوْتُ ۙ يُخْرِجُوْنَهُمْ مِّنَ النُّوْرِ اِلَى الظُّلُمٰتِ ۗ اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ هُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٢٥٧﴾

ईमान आणणाऱ्यांचा,अल्लाह वली (सरपरस्त) आहे. तो त्यांना अंधकारातून प्रकाशाकडे काढून नेतो. आणि काफिरांचे दोस्त शैतान आहेत. ते त्यांना प्रकाशातून काढून अंधाराकडे घेवून जातात. हे लोक नरकाग्नीत जाणारे आहेत. जे नेहमीसाठी त्यांत पडून राहतील (२५७)

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْ حَآجَّ اِبْرٰهٖمَ فِيْ رَبِّهٖٓ اَنْ اٰتٰىهُ اللّٰهُ الْمُلْكَ ۘ اِذْ قَالَ اِبْرٰهٖمُ رَبِّيَ الَّذِيْ يُحْيٖ وَيُمِيْتُ ۙ قَالَ اَنَا اُحْيٖ وَاُمِيْتُ ۗ قَالَ اِبْرٰهٖمُ فَاِنَّ اللّٰهَ يَاْتِيْ بِالشَّمْسِ مِنَ الْمَشْرِقِ فَاْتِ بِهَا مِنَ الْمَغْرِبِ فَبُهِتَ الَّذِيْ كَفَرَ ۗ وَاللّٰهُ لَا يَهْدِي الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ﴿٢٥٨﴾

काय तुम्ही त्याला पाहिले नाही? जो राज्य मिळाल्यानंतर इब्राहीम (अ.) शी,त्याच्या पालनकर्त्याच्या बाबतीत भांडत होता. जेव्हा इब्राहीम (अ.) नी सांगितले की, माझा पालनकर्ता तर तो आहे, जो जिवंत करतो आणि मारतो. तो म्हणू लागला, मी पण जिवंत करतो आणि मारतो. इब्राहीम (अ.) नी म्हटले अल्लाहतआला सूर्याला पूर्वेकडून घेवून येतो, तू त्याला पश्चिमेकडून घेवून ये. आता तर तो काफिर हक्काबक्का राहून गेला. आणि अल्लाहतआला जालिमांना मार्गदर्शन देत नाही (२५८)

اَوْ كَالَّذِيْ مَرَّ عَلٰى قَرْيَةٍ وَّهِيَ خَاوِيَةٌ عَلٰى عُرُوْشِهَا ۚ قَالَ اَنّٰى يُحْيٖ هٰذِهِ اللّٰهُ بَعْدَ مَوْتِهَا ۚ فَاَمَاتَهُ اللّٰهُ مِائَةَ عَامٍ ثُمَّ بَعَثَهٗ ۗ قَالَ كَمْ لَبِثْتَ ۗ قَالَ لَبِثْتُ يَوْمًا اَوْ بَعْضَ يَوْمٍ ۗ قَالَ بَلْ لَّبِثْتَ مِائَةَ عَامٍ فَانْظُرْ اِلٰى طَعَامِكَ وَشَرَابِكَ لَمْ يَتَسَنَّهْ ۚ وَانْظُرْ اِلٰى حِمَارِكَ وَلِنَجْعَلَكَ اٰيَةً لِّلنَّاسِ وَانْظُرْ اِلَى الْعِظَامِ كَيْفَ نُنْشِزُهَا ثُمَّ نَكْسُوْهَا لَحْمًا ۗ فَلَمَّا تَبَيَّنَ لَهٗ ۙ قَالَ اَعْلَمُ اَنَّ اللّٰهَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿٢٥٩﴾

किंवा त्या माणसासारखा ज्याचे जाणे त्या वस्तीवर झाले, जीआपल्या छतासह उलटी पडलेली होती; तो म्हणू लागला,त्याच्या मृत्यूनंतर अल्लाहतआला त्याला कशाप्रकारे जिवंत करेल?(२) तर अल्लाहतआलाने त्याला मृत्यू दिला शंभर वर्षाकरीता. मग त्याला उठविले. विचारले, तुझ्यावर किती काळ पसार झाला? (तो) म्हणू लागला, एक दिवस किंवा एक दिवसाचा काही भाग(३). सांगितले की (नाही) परंतु तू (या अवस्थेत) शंभर वर्षे राहिला तर तू आपल्या खाण्यापिण्याच्या (वस्तूंना) पहा; त्या बिलकुल खराब झालेल्या नाहीत. आणि आपल्या गाढवालाही पहा. आम्ही तुला लोकांसाठी एक निशाणी बनवत आहोत. तू पहा की, आम्ही हाडांना कसे उभारतो; मग त्यावर मांस चढवितो. जेव्हा हे सर्व जाहीर होऊन चुकले, तर म्हणू लागला, मी जाणतो की, अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे(४) (२५९)

१) याच्या अवतरण्याच्या कारणांत सांगितले जाते की, अन्सारचे काही नवयुवक यहूदी किंवा खिस्ती होऊन गेले होते; मग जेव्हा हे अन्सार मुसलमान होऊन गेले; ते त्यांनी आपल्या नवजवान संततीला पण जे यहूदी किंवा खिस्ती होऊन चुकले होते, जबरदस्ती मुसलमान बनवू इच्छिले. ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले. अवतरण्याच्या या कारणाच्या दृष्टीकोनातून काही भाष्यकारांनी याला ग्रंथधारी लोकांसाठी खास मानले आहे. म्हणजे मुसलमानांच्या राज्यात राहणारे ग्रंथधारी लोक, जर ते जिझीया देत असतील तर त्यांना इस्लाम कबूल करण्याला भाग पाडले जावू नये. परंतु हे महावाक्य आदेशाच्या दृष्टीने सर्वांना लागू (आम) आहे. म्हणजे कोणावर देखील,इस्लाम कबूल करण्यासाठी जबरदस्ती केली जाणार नाही; कारण अल्लाहने मार्गदर्शन आणि मार्गभ्रष्टता दोघांना स्पष्ट करून दिले आहे. तथापि कुफ्र आणि शिर्क संपविण्याला आणि असत्याचा (बातील) जोर तोडण्यासाठी जिहाद ही एक जबरदस्ती करण्यापासून वेगळी गोष्ट आहे. उद्देश, समाजातील त्या शक्तीचा जोर आणि दबाव संपविणे आहे; जी

अल्लाहच्या धर्मावर अंमलबजावणी आणि प्रचाराच्या मार्गात अडसर बनलेली असेल. कारण की, प्रत्येक मनुष्य आपल्या स्वतंत्र मर्जीने पाहिजे तर कुफ्रवर कायम राहो. आणि पाहिजे तर इस्लाममध्ये प्रवेश करून घ्यावा. कारण की अडसर बनणाऱ्या शक्ती वारंवार डोके वर काढत राहतील. यासाठी जिहादचा हुकूम आणि त्याची आवश्यकता सुद्धा कयामतपर्यंत राहील. जसे की,हदीसमध्ये आहे. ''जिहाद कयामतपर्यंत चालू राहील.'' स्वत: नबी ﷺ नी काफिर आणि बहुदेववाद्यांशी जिहाद केले आहे. आणि म्हटले, ''मला हुकूम देण्यात आला आहे की, मी लोकांशी त्यावेळेपर्यंत जिहाद करावे, जोपर्यंत ते ''लाइलाह इल्लल्लाह मोहम्मदुर रसूलुल्लाह'' ला मानणार नाही'' (सही बुखारी). त्याचप्रमाणे इस्लामकडून फिरून जाण्याची शिक्षा ''वध'' चाही या महावाक्यांशी काही विरोधाभास नाही. जसे की काही लोक मानतात. कारण की मुरतदची शिक्षा,वधाचा उद्देश, जोर जबरदस्तीने नाही किंबहुना इस्लामी राज्याचे दृष्टीगोचर होणारे संरक्षण आहे. एका इस्लामी राज्यात, काफिराला आपल्या कुफ्रवर कायम राहण्याची परवानगी तर निःसंशय दिली जाऊ शकते. परंतु एकदा का तो इस्लाममध्ये दाखल झाला; तर मग याचे विरूद्ध बंड व याचे कडून फिरून जाणे, याची परवानगी दिली जाऊ शकत नाही. म्हणून त्याने खूप विचार करून इस्लामात यावे. कारण की अशी परवानगी देऊन दिली असली तर, दृष्टीगोचर होणारे मूळ (बुनियाद,असास) खिळखिळे होण्याची शक्यता होती. ज्यामुळे दृष्टीगोचर होणारे गोंधळ आणि लोकांच्या विचारांची अंदाधुंदी पसरली असती, जी इस्लामी समाजाच्या सुखशांती आणि राज्याच्या स्थिर राहण्याला धोक्यात टाकू शकली असती. यासाठी ज्याप्रमाणे,मानवी अधिकारांच्या नावाखाली खून,चोरी,बलात्कार,डाका आणि लढाई वगैरे गुन्ह्यांना परवानगी दिली जावू शकत नाही. याचप्रमाणे मत स्वातंत्र्याच्या नावावर, एका इस्लामी राज्यात श्रद्धेच्या बंडाची पण परवानगी दिली जाऊ शकत नाही. ही जोरजबरदस्ती नाही. परंतु मुरतदचा वध याप्रमाणे योग्य न्याय आहे. याप्रमाणे खून, रक्तपात आणि चारित्र्यहनन करणाऱ्याच्या गुन्ह्याचा,अवलंब करणाऱ्यांना कडक शिक्षा देणे एकदम न्यायसंगत आहे. एकाचा उद्देश राज्याचे (नजरीयाती) सरंक्षण करण्याचा आहे. दुसऱ्याचा उद्देश राज्याला खोडसळपणा आणि अनाचारापासून वाचविणे आहे. आणि हे दोन्हीही उद्देश एका राज्यासाठी अत्यावश्यक आहेत. आज इस्लामी राज्य, या दोन्हीही उद्देशांना दृष्टीआड करून, ज्या परेशानी आणि कठीणाईचा सामना करीत आहे; त्याचे स्पष्टीकरण करण्याची गरज नाही.

२) आणि अर्थ असा की, आपण (पहिल्या घटनेप्रमाणे) त्या माणसाच्या गोष्टीवर दृष्टी टाकली नाही, जो एका वस्तीवरून चालला होता,....... हा मनुष्य कोण होता? याबाबतीत वेगवेगळे कथन करण्यात आले आहेत. जास्त प्रसिद्ध ह. उजैर عليه السلام चे नाव आहे. ज्याचे काही सहाबा رضي الله عنه व ताबेईन رحمهم الله मान्य करणारे आहेत. अल्लाह जास्त जाणणारा आहे. याच्या पूर्वीच्या घटने (ह.इब्राहीम عليه السلام व नमरूद) मध्ये बारी तआलाच्या अस्तित्वाचा पुरावा होता. आणि या दुसऱ्या घटनेमध्ये, अल्लाहतआलाच्या मृतास जीवन देण्यांच्या असलेल्या सामर्थ्याला मान्यता देण्यात आली आहे. की; ज्या अल्लाहतआलाने, त्या माणसाला आणि त्याच्या गाढवाला शंभर वर्षानंतर जिवंत केले. येथपावेतो की, त्याच्या खाण्यापिण्याच्या वस्तूपण खराब होऊ दिल्या नाही. तोच अल्लाहतआला कयामतच्या दिवशी सर्व मनुष्यांना दुसऱ्यांदा जिवंत करीन. जेव्हा तो शंभर वर्षानंतर जिवंत करू शकतो, तर हजारो वर्षानंतर जिवंत करणे त्याच्यासाठी कठीण नाही.

३) असे सांगण्यात येते की, जेव्हा तो उल्लेखित मनूष्य मृत्यू पावला, तेव्हा दिवस थोडा वर आला होता. आणि जेव्हा जिवंत झाला तेव्हा आता संध्याकाळपण झाली नव्हती. त्यावरून त्याने असा अंदाज केला; जर येथे मी काल आलो असेल, तर एकदिवस झालेला आहे. आणि जर ही आजचीच घटना आहे, तर दिवसांचा काही भागच पसार झाला आहे. पण, खरी गोष्ट अशी होती की, त्याच्या मृत्यूला शंभर वर्षे होऊन चुकली होती.

४) म्हणजे भरोसातर मला पूर्वीच होता; पण आता प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहून घेतल्यावर माझ्या विश्वासात आणि ज्ञानात आणखी दृढता आणि वाढ झाली आहे.

وَاِذْ قَالَ اِبْرٰهٖمُ رَبِّ اَرِنِیْ كَیْفَ تُحْیِ الْمَوْتٰی ؕ
قَالَ اَوَلَمْ تُؤْمِنْ ؕ قَالَ بَلٰی وَلٰكِنْ لِّیَطْمَىِٕنَّ
قَلْبِیْ ؕ قَالَ فَخُذْ اَرْبَعَةً مِّنَ الطَّیْرِ فَصُرْهُنَّ
اِلَیْكَ ثُمَّ اجْعَلْ عَلٰی كُلِّ جَبَلٍ مِّنْهُنَّ جُزْءًا ثُمَّ
ادْعُهُنَّ یَاْتِیْنَكَ سَعْیًا ؕ وَاعْلَمْ اَنَّ اللّٰهَ عَزِیْزٌ
حَكِیْمٌ ﴿۲۶۰﴾

**आणि जेव्हा इब्राहीम (अ.) ने म्हटले, हे माझ्या पालनकर्त्या! मला दाखिव, की तू मृतांना कशाप्रकारे जिवंत करशील?[१] अल्लाहतआलाने म्हटले, का तुला याच्यावर विश्वास नाही? उत्तर दिले, विश्वास तर आहे, पण माझ्या अंत:करणाचे समाधान होऊन जाईल. सांगितले चार पक्षी घे. त्याचे तुकडे (तुकडे) करून टाक. मग प्रत्येक डोंगरावर त्यांच्या एक (एक) तुकडा ठेवून दे. मग त्यांना बोलीव. तुमच्याजवळ पळत पळत येतील. आणि लक्षांत असू दे अल्लाहतआला सर्व समर्थ आणि बुद्धीमान आहे (२६०)**

مَثَلُ الَّذِیْنَ یُنْفِقُوْنَ اَمْوَالَهُمْ فِیْ سَبِیْلِ اللّٰهِ
كَمَثَلِ حَبَّةٍ اَنْۢبَتَتْ سَبْعَ سَنَابِلَ فِیْ كُلِّ سُنْۢبُلَةٍ
مِّائَةُ حَبَّةٍ ؕ وَاللّٰهُ یُضٰعِفُ لِمَنْ یَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ وَاسِعٌ
عَلِیْمٌ ﴿۲۶۱﴾

**जे लोक आपली संपत्ती अल्लाहच्या मार्गात खर्च करतात; त्याचे उदाहरण त्या दाण्यासारखे आहे ज्यातून सात कणसे निघावीत आणि प्रत्येक कणसामध्ये शंभर दाणे असावेत आणि अल्लाहतआला ज्याला इच्छिल त्याला भरपूर वाढवून देईन[२]. आणि अल्लाहतआला (अति) उदार व सर्वज्ञानी आहे (२६१)**

१) ही मृताला जिवंत करण्याची दुसरी घटना आहे; जी, एक अत्यंत प्रतिष्ठीत आणि सन्मानित पैगंबर ह.इब्राहीम (عليه السلام) च्या इच्छे आणि आंतरीक समाधानासाठी दाखविण्यात आली. हे चार पक्षी कोणते होते? भाष्यकारांनी वेगवेगळी नांवे सांगितली आहेत; परंतु नावांच्या ठरविण्याचा काही फायदा नाही. यासाठी अल्लाहने पण यांच्या नावांचा उल्लेख केलेला नाही. बस, हे फक्त चार वेगवेगळे पक्षी होते. 'फसूरहुन्न' चा एक अर्थ अमिलहुन्न' केला गेला आहे. म्हणजे त्यांना माणसाळून घे. कारण जिवंत झाल्यानंतर त्यांना सहजतेने ओळखून घेता येईल. की हे तेच पक्षी आहेत.आणि कुठल्याही प्रकारचा संशय बाकी राहू नये. अर्थ असा की, तुकडे तुकडे करून वेगवेगळ्या डोंगरांवर ते एकत्र मिसळून ठेववून दे. मग तू त्यांना आवाज दे; तर ते जिवंत होऊन तुझ्या जवळ येऊन लागतील. तात्पर्य असेच झाले. काही नव्या आणि जुन्या भाष्यकारांनी (जे सहाबा आणि ताबेईन आणि सलफच्या मनहज व मसलकला महत्त्व देत नाही) 'फसुरहुन्न' चे भाषांतर फक्त हिलाले (माणसाळून घे) केलेला आहे आणि त्यांचे तुकडे करणे आणि डोंगरांवर त्यांचे अवशेष विखरूण टाकणे आणि मग अल्लाहच्या सामर्थ्याने त्यांच्या जुळवणीला ते मान्य करीत नाही, परंतु हे भाष्य बरोबर नाही. यामुळे या घटनेची सर्व गौरवांकित सत्यता, संपून जाते आणि मृताला जिवंत करून देण्याचा प्रश्न जसाचा तसाच बाकी रहातो. वास्तविक या घटनेच्या वर्णनाचा उद्देश अल्लाहतआलाचे विशेषण, ''मृताला जिवंत करणारा आणि त्यांचे पूर्ण सामर्थ्याचे जाहिरीकरण आहे.'' एका हदीसमध्ये आहे, नबी ﷺ नी इब्राहीम (عليه السلام) ला या घटनेची चर्चा करून सांगितले, ''आम्ही ह.इब्राहीम (عليه السلام) पेक्षा जास्त संशयाला पात्र आहोत.'' (सही बुखारी) याचा हा अर्थ नाही की, ह.इब्राहीम (عليه السلام) नी संशय व्यक्त केला. वास्तविक आम्ही त्यांच्यापेक्षा जास्त संशयास पात्र ठरतो. म्हणजे ह.इब्राहीम (عليه السلام) च्या संशयाचे निरसन आहे. म्हणजे इब्राहीम (عليه السلام) नी मृतांना जिवंत करण्याच्या मसल्यात संशय घेतला नाही; जर त्यांनी संशय जाहीर केला असता, तर आम्ही खचित्च, संशय घेण्यात त्यांच्यापेक्षा जास्त पात्र असतो. (जास्त खुलाशासाठी पहा (फत्हुल कदीर, शौकानी (رحمه الله))

२) हे अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याचे महत्त्व आहे. याच्याने अभिप्रेत तर जिहाद आहे तर याचा अर्थ असा होईल की जिहाद मध्ये खर्च केलेल्या रकमेवर हे पुण्य असेल. आणि जर याने अभिप्रेत सर्व चांगल्या कामात खर्च करणे आहे, तर हे श्रेष्ठत्व पोराबाळांच्या अन्न,वस्त्र खर्चात (नफकात) आणि नफील दानधर्मात असेल. आणि दुसरी पुण्ये एका पुण्याचे फल दहापट च्या अंतर्गत येतील. (फत्हुल कदीर) जणू, अन्नवस्त्राचा खर्च आणि दानधर्माचे सर्व साधारण प्रतिफल,दुसऱ्या भलाईच्या कामांपेक्षा श्रेष्ठ आहे. अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याचे हे महत्त्व व श्रेष्ठत्वाचे कारणपण स्पष्ट आहे की, जोपर्यंत सामान आणि युद्धाची शस्त्रात्रे यांचा बंदोबस्त होणार नाही; लष्कराचे कामकाज पण प्रभावित होईल; आणि युद्ध सामग्री आणि शस्त्रात्रे पैशांविना मिळू शकत नाही.

| | |
|---|---|
| الَّذِينَ يُنفِقُونَ أَمْوَالَهُمْ فِي سَبِيلِ اللَّهِ ثُمَّ لَا يُتْبِعُونَ مَا أَنفَقُوا مَنًّا وَلَا أَذًى ۙ لَّهُمْ أَجْرُهُمْ عِندَ رَبِّهِمْ وَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُونَ ﴿٢٦٢﴾ | जे लोक आपली संपत्ती अल्लाहच्या मार्गात खर्च करतात; आणि त्यानंतर उपकार दाखवित नाही आणि इजा पोहचवित नाही[१]. त्याचा मोबदला त्याच्या पालनकर्त्याकडे आहे; आणि त्यांना कसलेच भय राहणार नाही आणि ते दु:खीपण होणार नाहीत (२६२) |
| قَوْلٌ مَّعْرُوفٌ وَمَغْفِرَةٌ خَيْرٌ مِّن صَدَقَةٍ يَتْبَعُهَا أَذًى ۗ وَاللَّهُ غَنِيٌّ حَلِيمٌ ﴿٢٦٣﴾ | नम्र गोष्ट करणे आणि माफ करून टाकणे, त्या दानधर्मापेक्षा उत्तम आहे, ज्याच्यानंतर इजा पोहचवली जाईल[२] आणि अल्लाहतआला निरपेक्ष आणि कनवाळू आहे. (२६३) |
| يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تُبْطِلُوا صَدَقَاتِكُم بِالْمَنِّ وَالْأَذَىٰ كَالَّذِي يُنفِقُ مَالَهُ رِئَاءَ النَّاسِ وَلَا يُؤْمِنُ بِاللَّهِ وَالْيَوْمِ الْآخِرِ ۖ فَمَثَلُهُ كَمَثَلِ صَفْوَانٍ عَلَيْهِ تُرَابٌ فَأَصَابَهُ وَابِلٌ فَتَرَكَهُ صَلْدًا ۖ لَّا يَقْدِرُونَ عَلَىٰ شَيْءٍ مِّمَّا كَسَبُوا ۗ وَاللَّهُ لَا يَهْدِي الْقَوْمَ الْكَافِرِينَ ﴿٢٦٤﴾ | हे ईमानवाल्यांनो! आपल्या दानधर्माला उपकार दाखवून आणि इजा देऊन बरबाद करू नका. ज्याप्रमाणे तो मनुष्य, आपली संपत्ती लोकांना दाखविण्यासाठी खर्च करीतो; आणि न अल्लाहवर ईमान ठेवतो, न कयामतच्या दिवसावर. त्याचे उदाहरण त्या साफ दगडासारखे आहे, ज्याच्यावर थोडी माती असावी, मग त्यावर जोरदार पाऊस पडावा; आणि तो त्याला एकदम स्वच्छ आणि कठीण करून टाकेल[३]. देखावा दाखविणाऱ्यांना आपल्या कमाईतून काहीही हातात येत नाही. आणि अल्लाहतआला काफिरांच्या समूहाला मार्गदर्शन करीत नसतो (२६४) |

१) अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याचे उल्लेखित श्रेष्ठत्व फक्त त्या माणसाला प्राप्त होईल; जो संपत्ती खर्च करण्याचे उपकार दाखवत नाही. न जिभेने असे शब्द काढत जे (मनाला) इजा करतील, ज्यामुळे कोण्या गरीब व मोहताजची अप्रतिष्ठा होईल आणि त्याला त्रासदायक वाटेल. हा इतका मोठा अपराध आहे की, नबी ﷺ चे फरमान आहे की, ''कयामतच्या दिवशी अल्लाहतआला तीन माणसांबरोबर संभाषण करणार नाही; त्यांच्यातून एक उपकार दर्शविणारा आहे.'' (स. मुस्लिम)

२) मागणी करणाऱ्यांशी नम्रपणे आणि कनवाळू वृत्तीने बोलणे किंवा प्रार्थनामय शब्दांनी (अल्लाहतआला तुलासुध्दा आणि आम्हाला सुद्धा, आपल्या कृपेने देवो! वगैरे) नी त्याला उत्तर देणे, यात भलाई आहे आणि 'मगफिरतून' चा अर्थ मागणी करणाऱ्याच्या दारिद्र्याचा आणि त्याच्या आवश्यकतेचे लोकांसमोर प्रदर्शन न करणे आणि त्यावर आच्छादन टाकणे आहे; आणि सवाल करणाऱ्यांकडून जर एखादी अयोग्य गोष्ट त्याच्या जिभेने निघाली, तर त्यांकडे डोळेझांक करणे पण यांत शामील आहे. म्हणजे सवाल करणाऱ्यांशी नम्र व्यवहार, कनवाळूपणा आणि डोळे बंद करणे त्यांच्या दोषांवर आच्छादन त्या दानधर्मापेक्षा उत्तम आहे. की ज्याच्यानंतर त्याला लोकांमध्ये, अप्रतिष्ठीत करून त्याला त्रास दिला जावा. यासाठी हदीसमध्ये सांगण्यात आले आहे की ''पवित्र शब्दपण सदका (दानधर्म) आहेत.'' (स. मुस्लीम) ''तुम्ही कुठल्याही भलाईला क्षुल्लक समजू नका. जरी ते आपल्या भावाशी उमद्या वृत्तीने (खंदा पेशानी) भेटणे कांअसेना!'' (स. मुस्लीम)

३) यांच्यात एक तर हे सांगण्यात आले आहे की, दानधर्म करून उपकार दर्शविणे आणि त्रास देणाऱ्या गोष्टी करणे; ईमानवाल्यांना शोभत नाही. उलट त्या लोकांचे काम आहे, जे मुनाफिक (दांभिक) आहेत. आणि लोकांना दाखविण्याकरीता खर्च करतात. दुसरे अशा खर्चाचे उदाहरण साफ खडकासारखे आहे; ज्यावर काही माती असेल, कोणी मनुष्य तीपासून काही उत्पन्न घेण्यासाठी त्यात बी पेरेल; परंतु पावसाचा एक जोरदार झटका पडताच ती सर्व माती त्या खडकावरून वाहून जावी आणि तो खडक माती गेल्याने बिलकुल साफ होऊन जावा. म्हणजे ज्याप्रमाणे पाऊस, त्या दगडासाठी फायदेकारक सिद्ध होत नाही; त्याचप्रमाणे देखावा दाखवणाऱ्यालाही त्याच्या दानधर्मापासून त्याचा काही फायदा होणार नाही.

وَمَثَلُ الَّذِينَ يُنْفِقُونَ أَمْوَالَهُمُ ابْتِغَاءَ مَرْضَاتِ
اللَّهِ وَتَثْبِيتًا مِنْ أَنْفُسِهِمْ كَمَثَلِ جَنَّةٍ بِرَبْوَةٍ
أَصَابَهَا وَابِلٌ فَآتَتْ أُكُلَهَا ضِعْفَيْنِ ۚ فَإِنْ لَمْ
يُصِبْهَا وَابِلٌ فَطَلٌّ ۗ وَاللَّهُ بِمَا تَعْمَلُونَ بَصِيرٌ ﴿٢٦٥﴾

**त्या लोकांचे उदाहरण जे आपली संपत्ती अल्लाहच्या मर्जी संपादनांत आणि मनाच्या (राजी) खुषीने आणि विश्वासासह खर्च करतात. त्या बागेसारखी आहे, जी उंच जमिनीवर असेल[१] आणि जोरदार पाऊस तिच्यावर पडेल,तर ती आपली फळे दुप्पट देईल. आणि जर हिच्यावर पाऊस झाला नाही तर फुवार (हलकी वर्षा) पण पुरेशी आहे. आणि अल्लाहतआला तुमची कर्मे पहात आहे (२६५)**

أَيَوَدُّ أَحَدُكُمْ أَنْ تَكُونَ لَهُ جَنَّةٌ مِنْ نَخِيلٍ وَ
أَعْنَابٍ تَجْرِي مِنْ تَحْتِهَا الْأَنْهَارُ لَهُ فِيهَا
مِنْ كُلِّ الثَّمَرَاتِ وَأَصَابَهُ الْكِبَرُ وَلَهُ ذُرِّيَّةٌ
ضُعَفَاءُ فَأَصَابَهَا إِعْصَارٌ فِيهِ نَارٌ فَاحْتَرَقَتْ ۗ
كَذَٰلِكَ يُبَيِّنُ اللَّهُ لَكُمُ الْآيَاتِ لَعَلَّكُمْ تَتَفَكَّرُونَ ﴿٢٦٦﴾

**काय तुमच्यातून कोणीही असे इच्छितो की, त्याचा खजुरांचा आणि द्राक्षांचा (एक) बाग असावा. ज्यांत कालवे वाहत असावेत, आणि प्रत्येक प्रकारची फळे (त्यांत) असावीत. (आणि ) तो मनुष्य म्हातारपणाला पोहचलेला असावा. त्याची लहान लहान मुले पण असावीत, आणि अचानक बागेला वादळाचा तडाखा (बगुला) बसावा. ज्यात अग्नी पण असेल, मग तो बाग जळून जावा[२]. याप्रमाणे अल्लाहतआला तुमच्या करीता निशाण्या (आयते) वर्णन करतो; की तुम्ही चिंतन आणि मनन करावे (२६६)**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا أَنْفِقُوا مِنْ طَيِّبَاتِ مَا كَسَبْتُمْ
وَمِمَّا أَخْرَجْنَا لَكُمْ مِنَ الْأَرْضِ ۖ وَلَا تَيَمَّمُوا
الْخَبِيثَ مِنْهُ تُنْفِقُونَ وَلَسْتُمْ بِآخِذِيهِ إِلَّا أَنْ
تُغْمِضُوا فِيهِ ۚ وَاعْلَمُوا أَنَّ اللَّهَ غَنِيٌّ حَمِيدٌ ﴿٢٦٧﴾

**हे ईमानवाल्यांनो! आपल्या पवित्र कमाईतून आणि जमिनीतून तुमच्यासाठी काढलेल्या वस्तूंमधून खर्च करा[३]. यांच्यातून खराब वस्तू देण्याचा इरादा करू नका. ज्यांना तुम्ही स्वत: घेणार नाही. हां! जर डोळे बंद करून घेतले[४] तर (वेगळी गोष्ट आहे) आणि लक्षात असू द्या अल्लाहतआला स्वावलंबी आणि स्तुतीस पात्र (हमीद) आहे (२६७)**

الشَّيْطَانُ يَعِدُكُمُ الْفَقْرَ وَيَأْمُرُكُمْ بِالْفَحْشَاءِ ۖ
وَاللَّهُ يَعِدُكُمْ مَغْفِرَةً مِنْهُ وَفَضْلًا ۗ وَاللَّهُ
وَاسِعٌ عَلِيمٌ ﴿٢٦٨﴾

**शैतान तुम्हाला दारिद्रय येण्यापासून भिववितो आणि निर्लज्जपणा (ची कामे) करण्यास सांगतो[५]. आणि अल्लाहतआला तुमच्याशी आपल्या माफीचा आणि कृपेचा वायदा करतो. अल्लाहतआला (अति) उदार आणि (सर्व) ज्ञानी आहे (२६८)**

يُؤْتِي الْحِكْمَةَ مَنْ يَشَاءُ ۚ وَمَنْ يُؤْتَ الْحِكْمَةَ
فَقَدْ أُوتِيَ خَيْرًا كَثِيرًا ۗ وَمَا يَذَّكَّرُ إِلَّا أُولُو الْأَلْبَابِ ﴿٢٦٩﴾

**तो ज्याला इच्छेल,त्याला बुद्धी आणि शहाणपण देतो. आणि ज्या माणसाला सुबुध्दी आणि समज दिली गेली (तर) त्याला पुष्कळच भलाई दिली गेली[६]; आणि उपदेश फक्त अक्कल बाळगणारेच ग्रहण करतात (२६९)**

१) हे त्या ईमानवाल्यांचे उदाहरण आहे, जे अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी खर्च करतात. त्याचा खर्च केलेला माल, त्या बागेसारखा आहे; जी वातावरणानेयुक्त उंच जागेवर असेल. की जर जोरदार पाऊस असेल तर दुप्पट फळे देईल. नाहीतर जिला हलकीशी वर्षा आणि दवबिंदू पण पुरेसे होतात. याप्रमाणे त्यांचे खर्च सुद्धा कमी असोत वा जास्त, अल्लाहच्या मार्गात केलेले कितीतरी पटींनी मोबदला आणि पुण्यफळ मिळण्यास पात्र राहतील. ‘जन्नत’ त्या जमिनीला म्हणतात, जीत इतक्या मोठ्या संख्येने वृक्ष असतील की, जे जमिनीला झांकून टाकतील. किंवा ते बाग ज्याला चारही बाजूने कुंपण (कंपाउंड) असेल आणि कुंपणामुळे बाग नजरेआड असेल हे ‘जिन्न’ पासून निघाले आहे; (जन्नत) ‘जिन्न’ त्या निर्मितीचे (मखलूक) नांव आहे. जी डोळ्यांनी दिसत नाही. पोटातल्या मुलाला ‘जिनीन’ म्हणतात. तो पण दिसत नाही. वेडेपणाला ‘जुनून’ म्हटले जाते. की याच्यात पण अकलेवर पर्दा पडलेला असतो आणि जन्नतला पण याचसाठी ‘जन्नत’ म्हटले जाते की ती डोळ्यांनी दिसत नाही. ‘रब्वत्’ उंच जमिनीला म्हणतात. ‘वाबिल’ म्हणजे जोराचा पाऊस.

२) या देखाव्याच्या (रियाकारीच्या) नुकसानांना स्पष्ट करण्याला आणि यापासून वाचण्याला आणखी काही उदाहरणे देण्यात येत आहे, की ज्याप्रमाणे एका माणसाचा बाग असावा, ज्याच्यांत प्रत्येक प्रकारची फळे असावीत,

(म्हणजे यातून भरपूर उत्पन्नांची आशा असावी) तो माणूस आपल्या वृद्धत्वाला पोहचलेला असावा, आणि त्याची लहान लहान मुले असावीत. म्हणजे जो स्वत:सुद्धा वार्धक्यामुळे आणि अति वृद्धत्वाने, मेहनत मजुरी करण्याला असमर्थ झाला असेल; आणि संतती तर त्याच्या म्हातारपणाचा आधार तर काय? स्वत: आपला आर्थिक बोझा उचलण्यास योग्य नसावे. अशा स्थितीत जोरजोराचे वादळ व्हावे आणि त्याचा बाग जळून जावा. आता तो न स्वत: त्या बागेला पूर्वीसारखे करण्याचा लायक राहिला; न त्याची संतती. हीच स्थिती त्या देखावा करण्यासाठी खर्च करणाऱ्याची कयामतच्या दिवशी होईल; की दांभिकता आणि रियाकारीमुळे त्यांची सर्व कर्मे अक्रित जातील. जेव्हा की, तेथे पुण्याची सख्त आवश्यकता असेल. आणि दुसऱ्या पुण्याची कामे करण्याची संधी आणि फुरसत राहणार नाही. अल्लाहतआला म्हणतो, काय तुम्ही इच्छिता की तुमची पण अशीच स्थिती व्हावी? ह.इब्ने अब्बास ﷺ नी, आणि ह. उमर ﷺ या उदाहरणात, त्या लोकांना पण धरले आहे, जे आयुष्यभर पुण्य करीत असतात आणि शेवटच्या वयांत,शैतानाच्या जाळ्यात फसून अल्लाहचे आज्ञाभंजक होऊन जातात. ज्यामुळे आयुष्यभराचे पुण्य बर्बाद होऊन जाते. (सहीह बुखारी)

३) दानधर्माच्या कबूल होण्यासाठी जसे आवश्यक आहे की इजा देणे आणि देखावा करण्यापासून ते पाक (साफ) असावे (जसे पूर्वीच्या महावाक्यात सांगण्यात आले आहे.) त्यासाठी हे ही आवश्यक आहे की, ते हलाल व पवित्र कमाईपासून असावे. मग तो कारभार व्यापार व कारागिरी मुळे असो किंवा धनधान्य आणि बागांच्या उत्पन्नातून असो. आणि हे जे सांगितले गेले की,''खबीस वस्तूंना,अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याचा इरादा करू नका.'' तर खबीसने एकतर त्या वस्तू आहेत ज्या हराम कमाईपासून असतील; अल्लाहतआला त्याला कबूल करीत नाही. हदीसमध्ये आहे, ''अल्लाहतआला पवित्र आहे. पवित्र वस्तूच कबूल करीत असतो.'' खबीसचा दुसरा अर्थ, रद्दी आणि निकामी वस्तूचे आहे. रद्दी वस्तूपण अल्लाहच्या मार्गात खर्च केली जावू नयेत. जसा की, ''लन तनालुल बिर्र हत्ता तुनफिकुमिम्मा तुहिब्बून.'' चा पण भावार्थ आहे. याच्या अवतरण्याच्या कारणाच्या रिवायतीत सांगितले गेले आहे, काही मदिनेचे अन्सारी, खराब आणि निकामी खजुर दानधर्म म्हणून मशिदीत देवून जात असत. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले (फत्हुल कदीर तिर्‌मिझी आणि इब्नेबाजाच्या हवाल्याने)

४) म्हणजे तुम्ही स्वत: ज्याप्रमाणे रद्दी वस्तू घेणे पसंत करीत नाही त्याचप्रमाणे अल्लाहच्या मार्गात पण चांगल्या वस्तूच खर्च करा.

५) म्हणजे भल्या कामात,खर्च करावयाचा असेल, तर शैतान भिवविते की गरीब आणि दरिद्री होऊन जाल. परंतु वाईट कामांवर खर्च करावयाचा असेल तर अशा भीतींना जवळही फटकू देत नाही. परंतु त्या वाईट कामांना असे शोभायमान करून पुढे करितो की, वाईट कामनांना असे जागृत करतो की, त्यांच्यावर मनुष्य मोठ्यातली मोठी रक्कम बेधडक खर्च करून टाकतो. तात्पर्य असे पाहण्यात आले आहे की, मशिद किंवा मदरसा किंवा आणखी कोणत्या चांगल्या कामासाठी कोणी वर्गणी घेण्यास पोहचला; तर संपत्तीवाला (धनवान) शंभर दोनशेसाठी, वारंवार आपल्या जमाखर्चाची पडताळणी करतो. आणि मागणाऱ्याला कधी कधी वारंवार फिरवा फिरव करतो. परंतु हाच मनुष्य सिनेमा,टि.व्ही. व्याभिचार आणि कोर्ट कचेरी करणे वगैरेच्या जाळ्यात फसतो, तर आपली संपत्ती मुक्त हस्ताने (बेतहाशा) खर्च करतो. आणि यांच्यात कुठल्याही प्रकारचे संकोच आणि घाबरणे दिसत नाही.

६) हिकमतने काही जवळ अक्कल व समज व ज्ञान व काहीजवळ योग्य मत प्रदर्शन,कुरआनच्या महावाक्यांचे ज्ञान व त्याची कारणमिमांसा,आणि काही जवळ फक्त सुन्नत किंवा पुस्तक म्हणजे कुरआन आणि सुन्नत (म्हणजे हदीस) चे ज्ञान व त्याची कारणमिमांसा, आहे. किंवा हे सर्व विषय त्यांच्यात शामील केले जाऊ शकतात. सहीऐन वगैरेच्या एका हदीसमध्ये आहे की, दोन माणसांवर रश्क करणे: योग्य (जाएज) आहे. एक तो ज्याला अल्लाहने संपत्ती दिली आणि तो तिला सत्याच्या मार्गात खर्च करतो आहे. दुसरा तो, ज्याला अल्लाहने ज्ञान (बुद्धी) दिले, ज्याने तो निर्णय करतो, आणि लोकांना याचे शिक्षण देतो (स. बुखारी, स. मुस्लिम)

وَمَآ اَنۡفَقۡتُمۡ مِّنۡ نَّفَقَةٍ اَوۡ نَذَرۡتُمۡ مِّنۡ نَّذۡرٍ فَاِنَّ اللّٰهَ يَعۡلَمُهٗ ‌ؕ وَمَا لِلظّٰلِمِيۡنَ مِنۡ اَنۡصَارٍ ﴿۲۷۰﴾

**तुम्ही जेवढा काही खर्च कराल, म्हणजे दानधर्म आणि जो काही नवस मानाल[१]; त्याला अल्लाहतआला खूप चांगल्याप्रकारे जाणतो. आणि जालीमांचा कोणी मददगार नाही ⑳७०**

اِنۡ تُبۡدُوا الصَّدَقٰتِ فَنِعِمَّا هِىَ‌ ۚ وَاِنۡ تُخۡفُوۡهَا وَتُؤۡتُوۡهَا الۡفُقَرَآءَ فَهُوَ خَيۡرٌ لَّكُمۡ‌ ؕ وَيُكَفِّرُ عَنۡكُمۡ مِّنۡ سَيِّاٰتِكُمۡ‌ ؕ وَاللّٰهُ بِمَا تَعۡمَلُوۡنَ خَبِيۡرٌ ﴿۲۷۱﴾

**जर तुम्ही दानधर्म उघडपणे द्याल, तर ते पण चांगले आहे. आणि जर त्याला तुम्ही गुपचुप गुपचुपपणे गरीबांना द्याल; तर तो तुमच्यासाठी उत्तम आहे[२]. अल्लाहतआला तुमच्या अपराधांना क्षमा करील. आणि अल्लाहतआला तुमच्या सर्व कर्मांची खबर ठेवणारा आहे ㉗१**

لَيۡسَ عَلَيۡكَ هُدٰٮهُمۡ وَلٰـكِنَّ اللّٰهَ يَهۡدِىۡ مَنۡ يَّشَآءُ‌ ؕ وَمَا تُنۡفِقُوۡا مِنۡ خَيۡرٍ فَلِاَنۡفُسِكُمۡ‌ ؕ وَمَا تُنۡفِقُوۡنَ اِلَّا ابۡتِغَآءَ وَجۡهِ اللّٰهِ‌ ؕ وَمَا تُنۡفِقُوۡا مِنۡ خَيۡرٍ يُّوَفَّ اِلَيۡكُمۡ وَاَنۡتُمۡ لَا تُظۡلَمُوۡنَ ﴿۲۷۲﴾

**त्यांना मार्गदर्शनावर आणून उभे करणे तुमची जबाबदारी नाही; किंबहुना हिदायत अल्लाहतआला देतो, ज्याला इच्छितो. आणि तुम्ही जी चांगली वस्तू अल्लाहच्या मार्गात द्याल, त्याचा फायदा स्वत:च (भरून) पावाल. तुम्हाला फक्त अल्लाहतआलाची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठीच खर्च केला पाहिजे. तुम्ही जी काही संपत्ती खर्च कराल; त्याचा पुरापुरा मोबदला तुम्हास दिला जाईल[३]; आणि तुमचा हक्क मारला जाणार नाही ㉗२**

१) नवसाचा अर्थ आहे की, माझे अमुक काम होऊन गेले किंवा अमुक अडचणीतून सुटका झाली तर मी अल्लाहच्या मार्गात इतका दानधर्म करीन. या नवसाचे पूर्ण करणे जरूरी आहे. जर एखाद्या आज्ञाभंजनाची किंवा अयोग्य कामाचा नवस मानला असेल, तर त्याचे पूर्ण करणे जरूरी नाही. नवसपण,उपवास, नमाज सारखीच उपासना आहे. यासाठी अल्लाहतआलाशिवाय कुण्याा दुसऱ्याच्या नांवाचा नवस मानणे त्याची उपासना करणे आहे; जे शिर्क आहे. जसा आजकाल प्रसिद्ध कबरींवर नवस आणि नियाजचा क्रम सार्वत्रिक आहे. अल्लाहतआला या शिर्कपासून वाचवो! (आमीन)

२) यावरून हे ठाऊक झाले की, सर्वसाधारण परिस्थितीत, गुपचुपपणे दानधर्म करणे चांगले (अफजल) आहे. त्याशिवाय की कुण्या अशा स्थितीत जग जाहीरपणे दानधर्म करतात. जणे करून लोकांना दानधर्म करण्यात प्रवृत्त करण्याचा विचार असावा. जर देखावा करण्याची भावना नसेल, तर अशा प्रसंगी प्रथम (दान) करणारे जी खास फजीलत प्राप्त करू शकतात, ती हदीसने स्पष्ट आहे. तथापि अशा प्रकारच्या खास प्रसंगाव्यतिरिक्त दुसऱ्या मोक्यांना गुपचुपपणे दानधर्म करणेच चांगले आहे. नबी ﷺ नी म्हटले आहे, ज्या लोकांना कयामतच्या दिवशी अल्लाहच्या अर्षची सावली प्राप्त होईल त्यांच्यात तो मनुष्यपण असेल ज्याने इतक्या गुप्तपणे दानधर्म केला की, त्याच्या डाव्या हाताला सुद्धा हे ठाऊक झाले नाही की, त्याच्या उजव्या हाताने काय खर्च केला आहे? दानधर्मात गुप्ततेचे महत्त्व काही ऊलेमांनी फक्त नफील दानापुरते मर्यादित ठेवले आहे. आणि जकातच्या अदा करण्यात जाहीर करण्याला बेहतर समजले आहे. परंतु कुरआनचा सर्वसाधारण रोख नफील व वाजीब (फर्ज) दोन्ही दानांना (सदकात) शामील करतो. (इब्ने कसीर) आणि हदीसचा सर्वसाधारण रोख (अुमुम) याचेच समर्थन करतो.

३) भाष्यांच्या रिवायतीत, याच्या अवतरणाचे हे कारण सांगितले आहे की,मुसलमान आपल्या मुशरिक नातेवाईकांची मदत करणे योग्य समजत नसत. आणि ते इच्छित असत की, त्यांनी मुसलमान होऊन जावे. अल्लाहतआलाने म्हटले की, हिदायतच्या मार्गी लाऊन देणे हे फक्त अल्लाहच्या अधिकारांत आहे. दुसरी गोष्ट ही सांगितली की, त्यांच्यावर अल्लाहसाठी जो पण खर्च कराल, त्याचा पूर्ण मोबदला मिळेल. ज्यामुळे हे ठाऊक झाले की, गैरमुस्लिम नातेवाईकांशी सुद्धा सिलारहमी (चांगलेसंबंध) करणे, पुण्यफळ मिळण्याला कारणीभूत आहे. तथापि जकात फक्त मुसलमानांचाच हक्क आहे. ही कुण्या गैरमुस्लिमला दिली जावू शकत नाही.

لِلْفُقَرَآءِ الَّذِيْنَ اُحْصِرُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ لَا يَسْتَطِيْعُوْنَ ضَرْبًا فِي الْاَرْضِ يَحْسَبُهُمُ الْجَاهِلُ اَغْنِيَآءَ مِنَ التَّعَفُّفِ تَعْرِفُهُمْ بِسِيْمٰهُمْ لَا يَسْـَٔلُوْنَ النَّاسَ اِلْحَافًا ؕ وَمَا تُنْفِقُوْا مِنْ خَيْرٍ فَاِنَّ اللّٰهَ بِهٖ عَلِيْمٌ ﴿٢٧٣﴾

दानधर्माचे हकदार फक्त ते गरीब लोक आहेत जे अल्लाहच्या मार्गात कोंडून पडले आहेत. जे देशांत कोणीकडे जाऊही शकत नाही[१]. नादान लोक त्यांच्या न मागण्याच्या कारणाने, त्यांना मालदार समजतात. आपण त्यांच्या चेहऱ्यांना बघून अंदाजाने त्यांना ओळखून घ्याल. ते लोकांना बिलगुन मागत नाही[२]. तुम्ही जो काही माल खर्च कराल; त्याला अल्लाहतआला जाणतो (२७३)

اَلَّذِيْنَ يُنْفِقُوْنَ اَمْوَالَهُمْ بِالَّيْلِ وَالنَّهَارِ سِرًّا وَّعَلَانِيَةً فَلَهُمْ اَجْرُهُمْ عِنْدَ رَبِّهِمْ ۚ وَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿٢٧٤﴾

जे लोक आपल्या मालाला रात्रंदिवस गुपचुपपणे आणि जाहीररित्या खर्च करतात त्यांच्यासाठी, त्यांच्या पालनकर्त्यापाशी (मोठे) प्रतिफल आहे. आणि त्यांना भय राहणार नाही आणि उदासीपण राहणार नाही (२७४)

اَلَّذِيْنَ يَاْكُلُوْنَ الرِّبٰوا لَا يَقُوْمُوْنَ اِلَّا كَمَا يَقُوْمُ الَّذِيْ يَتَخَبَّطُهُ الشَّيْطٰنُ مِنَ الْمَسِّ ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمْ قَالُوْۤا اِنَّمَا الْبَيْعُ مِثْلُ الرِّبٰوا ۘ وَاَحَلَّ اللّٰهُ الْبَيْعَ وَحَرَّمَ الرِّبٰوا ؕ فَمَنْ جَآءَهٗ مَوْعِظَةٌ مِّنْ رَّبِّهٖ فَانْتَهٰى فَلَهٗ مَا سَلَفَ ؕ وَاَمْرُهٗۤ اِلَى اللّٰهِ ؕ وَمَنْ عَادَ فَاُولٰٓئِكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ هُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٢٧٥﴾

व्याज[३] खाणारे लोक उभे राहू शकणार नाहीत,परंतु अशा प्रकारे ज्याप्रमाणे तो उभा राहतो,ज्याला शैतानाने झपाटून बुद्धीभ्रष्ट करून सोडले असेल[४], हे यासाठी की ते म्हणत असत की, व्यापार पण तर व्याजासारखाच आहे[५]. वास्तविक अल्लाहतआलाने व्यापाराला हलाल केले. आणि व्याजाला हराम. जो मनुष्य आपल्याजवळ आलेल्या अल्लाहच्या उपदेशाला ऐकूण थांबून गेला; त्याचेसाठी ते आहे जे पूर्वी होऊन गेले[६]. आणि त्याचे प्रकरण अल्लाहच्या हवाली आहे[७]. आणि ज्याने पुन्हा (व्याज) घेतले तो नरकवासी आहे (आणि) असे लोक सदासर्वदा नरकातच राहतील (२७५)

يَمْحَقُ اللّٰهُ الرِّبٰوا وَيُرْبِي الصَّدَقٰتِ ؕ وَاللّٰهُ لَا يُحِبُّ كُلَّ كَفَّارٍ اَثِيْمٍ ﴿٢٧٦﴾

अल्लाहतआला व्याजाला नष्ट करतो आणि दानधर्मात वृध्दी करतो[८]. आणि अल्लाहतआला कोण्या कृतघ्नास आणि गुन्हेगारांशी प्रेम ठेवीत नाही (२७६)

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ وَاَقَامُوا الصَّلٰوةَ وَاٰتَوُا الزَّكٰوةَ لَهُمْ اَجْرُهُمْ عِنْدَ رَبِّهِمْ ۚ وَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿٢٧٧﴾

खचितच जे लोक ईमान आणून (सुन्नत प्रमाणे) सत्कृत्य करत असतात,नमाज कायम करतात आणि जकात देतात, त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी आहे. त्यांना कुठलेही भय नाही आणि उदासी व दु:ख पण नाही (२७७)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّقُوا اللّٰهَ وَذَرُوْا مَا بَقِيَ مِنَ الرِّبٰوۤا اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿٢٧٨﴾

हे ईमानवाल्यानो! अल्लाहतआलाला भ्या; आणि जे व्याज बाकी राहिले आहे; ते सोडून द्या; जर तुम्ही खरेखुरे ईमानदार असाल (२७८)

१) याच्याने अभिप्रेत ते मुहाजिरीन आहेत, जे मक्केहून मदिनेला आलेत; आणि अल्लाहच्या मार्गात प्रत्येक वस्तूपासून वंचित झालेत. धार्मिक ज्ञान प्राप्त करणारे विद्यार्थी आणि उलमापण याच्या अंतर्गत येऊ शकतात.

२) जणूं ईमानवाल्यांचे वैशिष्ठ्ये हे आहे की, दारिद्रय आणि गरीबी असतांना सुद्धा ते तआफुफ (म्हणजे मागणी करण्यापासून (स्वत:ला) वाचविणे) चा अंगिकार करतात आणि इलहाफ (बिलगून मागणे) पासून स्वत:ला वाचवत असतात. बिलकुल मागणी न करणे (मागणी सवाल) कारण की, यांची पहिली निशाणी निरपेक्षतेचे वर्णन करण्यात आले आहे. (फत्हुल कदीर) आणि काहींनी सांगितले ते मागणी करतांना गयावया करीत नसत आणि ज्या गोष्टींची त्यांना आवश्यकता नाही; ती लोकांकडून मागत नसत. यासाठी की, इलहाफ हा आहे की, आवश्यकता नसतांना सुद्धा (धंदा म्हणून) लोकांजवळ मागावे. या विषयाचे समर्थन त्या हदीसींनी होते, ज्यात म्हटले आहे की, ''मिस्कीन तो नाही. जो एक एक दोन दोन खजुरीसाठी किंवा एक एक दोन दोन घासांसाठी दरवाज्या दरवाज्यांवर जाऊन मागेल. मिस्कीन तर तो आहे. जो मागण्यापासून स्वत:ला वाचवीत राहील.'' मग नबी ﷺ नी महावाक्य ''लायसअलुनन्नासा इलहाफान'' चा पुरावा सादर केला (सहीह बुखारी). यासाठी धंदेवाईक फकीराऐवजी मुहाजिरीन, धार्मिक शिक्षण घेणारे विद्यार्थी, उलमा (धर्मपंडित) वरून व्यवस्थित दिसणाऱ्या (सुफीद पोश) गरजुंचा

शोध घेवून त्यांची मदत केली पाहिजे. जे मागण्याला (स्वत:ला) प्रतिबंधित करतात. कारण की, दुसऱ्यांसमोर हात पसरणे,माणसाच्या प्रतिष्ठेच्या आणि स्वाभिमानाच्या विरूद्ध आहे. याशिवाय हदीसमध्ये येते, ज्याच्याजवळ ''मा युगनी'' असेल (म्हणजे इतका सामान असेल जो त्याच्या आवश्यकता पूर्ण करीत असेल) परंतु असे असून सुद्धा तो लोकांकडे याचना करेल, तर कयामतच्या दिवशी त्याच्या चेहऱ्यावर जखमा असतील. (तिरमिझी) (बुखारी आणि मुस्लिमच्या रिवायतीत आहे की नेहमी लोकांजवळ याचना करणाऱ्यांच्या चेहऱ्यावर कयामतच्या दिवशी मांस राहणार नाही.)

३) 'रिबा'चा शब्दकोशीय अर्थ,जास्तीचे आणि वाढ होण्याचा आहे. आणि धर्मशास्त्रात याचा उपयोग रिबा अलफजल व रिबा अन्नसीया वर होतो. 'रिबाअलफजल' त्या व्याजाला म्हणतात, जे सहा वस्तूंच्या कमी बेशीला किंवा नगद,उधारच्या कारणाने होतो (ज्याचा खुलासा हदीसमध्ये आहे. उदाहरणार्थ गव्हाची देवाणघेवाण गव्हाने करावयाची आहे, तर सांगण्यात आले की, एक तर समान असावे. दुसरे हातोहात व्हावे. यांच्यात कमी जास्त असले. तरी सुद्धा आणि हातोहात होण्याऐवजी, एक नगद आणि दुसरे उधार किंवा दोन्ही ही उधार असेल, तरी सुद्धा व्याज आहे.) 'रिबा अलनसिया' चा अर्थ आहे, कोणाला उदारणार्थ, ६ महिन्यांसाठी या अटीवर १०० रू. द्यावे की परती १२५ रू. होईल. २५ रू. सहा महिन्याच्या अवकाशासाठी घेतले जावे. हजरत अली ﵁ च्या म्हणण्यानुसार याला याप्रमाणे सांगण्यात आले आहे ''कर्जावर घेतला गेलेला नफा व्याज आहे'' हे कर्ज वैयक्तिक आवश्यकतेसाठी घेतलेले असो;किंवा कारभारासाठी; दोन्ही प्रकारच्या कर्जावर घेतले गेलेले व्याज हराम आहे. आणि अज्ञान काळात सुद्धा दोन्ही प्रकारच्या कर्जाचा रिवाज होता. शरीअतने कुठल्याही प्रकारचा भेदाभेद न करता दोघांना स्पष्टपणे हराम ठरविले आहे. या करिता काही लोकांचे हे म्हणणे की, व्यापारी कर्ज (जे सर्व साधारणपणे बँकेकडून घेतले जाते) यांत वाढ,व्याज नाही; यासाठी की कर्ज घेणारा यापासून नफा कमवितो. ज्याचा काही भाग तो बँकेला किंवा कर्ज देणाऱ्याला परत देतो. तर यांत काय वाईट (कबाहत) आहे? याचा वाईटपणा या आधुनिक धर्म सुधारकांना दिसत नाही. जे याला योग्य ठरवू इच्छितात. नाहीतर अल्लाहतआलाच्या नजरेत तर यांत खूपच वाईट गोष्टी आहेत. उदाहरणार्थ कर्ज घेवून कारभार करणाऱ्याचा नफा तर खचित्च नाही; परंतु नफा तर सोडा, मूळ भांडवलाच्या संरक्षणाची पण काही जमानत नाही. काही वेळा कारभारांत सर्व रक्कम बुडीत होते. जेव्हा की याच्या उलट कर्ज देणारा (मग ती बँक असो वा कुणी सावकार) चा नफा पक्का आहे. ज्याचे अदा करणे कुठल्याही परिस्थितीत आवश्यक आहे. हा जुलुमाचा एक स्पष्ट प्रकार आहे. त्याला इस्लामी शरीअत कशाप्रकारे योग्य ठरवू शकते? उलट ही शरीअत ईमानवाल्यांना समाजातल्या गरजवंतांना कुठल्याही ऐहिक गरज आणि फायद्याशिवाय खर्च करण्याला प्रोत्साहीत करते. ज्यामुळे समाजात भाईचारा,सहानुभूती,एक दुसऱ्याची मदत करणे आणि कनवाळूवृत्ती आणि प्रेमाच्या भावना उभरू लागतात. याच्या उलट व्याज देण्याघेण्याच्या व्यवस्थेत कठीन हृदयता आणि अप्पलपोटेपणाला वाव मिळतो. एका भांडवलदाराला, आपल्या भांडवलाकडून नफ्याची अपेक्षा असते. मग समाजांत गरजवंत आजारीपणामुळे भुकेमुळे, गरीबीमुळे व्याकूळ झालेले असो, किंवा बेरोजगार आपल्या जीवनाला कंटाळलेले असो, शरीअत या दुर्देवाला,संकुचित वृत्तीला कशाप्रकारे पसंत करेल? याचे आणखी पुष्कळसे नुकसान (तोटे) आहेत. खुलासा करण्याला येथे वाव नाही. सारांश असा की व्याज एकदम हराम आहे. मग ते व्याज वैयक्तिक गरजेसाठी घेतलेल्या कर्जाचे व्याज असो, किंवा व्यापारी कर्जावरील व्याज असो.

४) व्याज खाणाऱ्याची ही अवस्था कबरेतून उठतांना किंवा हशरच्या मैदानात होईल.

५) वास्तविक व्यापारामध्ये तर नगद रक्कम आणि कोण्या वस्तूचा आपसात बदल होतो. दुसरे त्यात नफा किंवा नुकसान दोहोंची शक्यता असते. जेव्हा की व्याजामध्ये या दोन्ही वस्तू नदारद असतात. याशिवाय व्यापाराला अल्लाहने हलाल आणि व्याजाला हराम ठरविले आहे. मग हे दोन्ही एक कसे होऊ शकतात?

६) ईमान कबूल केल्यानंतर किंवा पश्चात्ताप (तौबा) व्यक्त केल्यानंतर मागच्या व्याजावर पकड होणार नाही.

७) की तो तौबावर दृढ राहतो किंवा वाईट कृत्याने आणि इरादयाच्या बिघाडाच्या कारणाने परिस्थितीवर सोडून देतो याचसाठी याच्यानंतर व्याज घेणाऱ्या करीता तंबी आहे.

८) हे व्याजाचे, आंतील व आत्मिक नुकसान आणि दानधर्माच्या बरकतीचे वर्णन आहे. व्याजात जाहीररित्या तर वाढ दिसून येते; परंतु आंतील हिशेबाने किंवा परिणामाच्या दृष्टीने व्याजाची रक्कम सर्वनाश व बरबादीला कारणीभूत होते. या वास्तविकतेला तर आता युरोपचे अर्थतज्ञ तज्ञ देखील कबूल करू लागले आहेत.

فَإِن لَّمْ تَفْعَلُوا فَأْذَنُوا بِحَرْبٍ مِّنَ اللَّهِ وَرَسُولِهِ ۖ
وَإِن تُبْتُمْ فَلَكُمْ رُءُوسُ أَمْوَالِكُمْ لَا تَظْلِمُونَ وَلَا
تُظْلَمُونَ ﴿٢٧٩﴾

आणि जर असे करणार नाही; तर अल्लाहतआलाशी आणि त्याच्या रसूलशी लढण्यासाठी तयार[१] होऊन जा. हा! जर तौबा करून घ्या, तर तुमची मूळ संपत्ती (तर) तुमचीच आहे. न तुम्ही जुलूम करावा; न तुमच्यावर जुलूम केला जावा[२] (२७९)

وَإِن كَانَ ذُو عُسْرَةٍ فَنَظِرَةٌ إِلَىٰ مَيْسَرَةٍ ۚ وَأَن
تَصَدَّقُوا خَيْرٌ لَّكُمْ ۖ إِن كُنتُمْ تَعْلَمُونَ ﴿٢٨٠﴾

आणि जर कोणी अडचणीत असेल, तर त्याला सुबत्तेपर्यंत सवलत दिली पाहिजे. आणि दान करून द्याल, तर तुमच्यासाठी फारच उत्तम आहे[३], जर तुम्ही जाणत असाल (२८०)

وَاتَّقُوا يَوْمًا تُرْجَعُونَ فِيهِ إِلَى اللَّهِ ۖ ثُمَّ تُوَفَّىٰ
كُلُّ نَفْسٍ مَّا كَسَبَتْ وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ﴿٢٨١﴾

आणि त्या दिवसाला भ्या, ज्यांत तुम्ही सर्व अल्लाहकडे परतविले जाल. आणि प्रत्येक माणसाला त्याच्या कर्माचा पुरा पुरा बदला दिला जाईल. आणि त्यांच्यावर जुलूम केला जाणार नाही[४] (२८१)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا إِذَا تَدَايَنتُم بِدَيْنٍ إِلَىٰ
أَجَلٍ مُّسَمًّى فَاكْتُبُوهُ ۚ وَلْيَكْتُب بَّيْنَكُمْ كَاتِبٌ
بِالْعَدْلِ ۚ وَلَا يَأْبَ كَاتِبٌ أَن يَكْتُبَ كَمَا عَلَّمَهُ
اللَّهُ ۚ فَلْيَكْتُبْ وَلْيُمْلِلِ الَّذِي عَلَيْهِ الْحَقُّ
وَلْيَتَّقِ اللَّهَ رَبَّهُ وَلَا يَبْخَسْ مِنْهُ شَيْئًا ۚ
فَإِن كَانَ الَّذِي عَلَيْهِ الْحَقُّ سَفِيهًا
أَوْ ضَعِيفًا أَوْ لَا يَسْتَطِيعُ أَن يُمِلَّ هُوَ فَلْيُمْلِلْ
وَلِيُّهُ بِالْعَدْلِ ۚ وَاسْتَشْهِدُوا شَهِيدَيْنِ مِن
رِّجَالِكُمْ ۖ فَإِن لَّمْ يَكُونَا رَجُلَيْنِ فَرَجُلٌ وَامْرَأَتَانِ
مِمَّن تَرْضَوْنَ مِنَ الشُّهَدَاءِ أَن تَضِلَّ إِحْدَاهُمَا
فَتُذَكِّرَ إِحْدَاهُمَا الْأُخْرَىٰ ۚ وَلَا يَأْبَ الشُّهَدَاءُ إِذَا
مَا دُعُوا ۚ وَلَا تَسْأَمُوا أَن تَكْتُبُوهُ صَغِيرًا أَوْ كَبِيرًا
إِلَىٰ أَجَلِهِ ۚ ذَٰلِكُمْ أَقْسَطُ عِندَ اللَّهِ وَأَقْوَمُ لِلشَّهَادَةِ
وَأَدْنَىٰ أَلَّا تَرْتَابُوا ۖ إِلَّا أَن تَكُونَ تِجَارَةً
حَاضِرَةً تُدِيرُونَهَا بَيْنَكُمْ فَلَيْسَ عَلَيْكُمْ
جُنَاحٌ أَلَّا تَكْتُبُوهَا ۗ وَأَشْهِدُوا إِذَا تَبَايَعْتُمْ ۚ
وَلَا يُضَارَّ كَاتِبٌ وَلَا شَهِيدٌ ۚ وَإِن تَفْعَلُوا
فَإِنَّهُ فُسُوقٌ بِكُمْ ۗ وَاتَّقُوا اللَّهَ ۖ وَيُعَلِّمُكُمُ اللَّهُ ۗ
وَاللَّهُ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيمٌ ﴿٢٨٢﴾

हे ईमानवाल्यांनो! जेव्हा तुम्ही आपसांत, एक दुसऱ्यांकडून ठराविक मुदतीसाठी कर्जाचा व्यवहार कराल, तर त्याला लिहून घेत चला[५]. आणि लिहिणाऱ्याला पाहिजे की तुमचा आपसातील व्यवहार न्यायाने लिहावा; लिहिणाऱ्याने पाहिजे की, लिहिण्यास नकार देऊ नये. जसे अल्लाहतआलाने त्याला शिकविले आहे. त्यालाही लिहून द्यावयास पाहिजे. आणि ज्याच्यावर घेणे असेल[६], त्याने लिहिवावे. आणि आपल्या अल्लाहला भ्यावे. जो त्याचा पालनकर्ता आहे. आणि घेण्यातून काही कमी न करावे. हां! ज्या माणसावर घेणे आहे तो जर नादान असेल किंवा दुर्बल असेल, किंवा लिहिविण्याचे सामर्थ्य बाळगीत नसेल, त्याच्या सांभाळणाऱ्याने (वली) न्यायपूर्वक रीतीने लिहून घ्यावे. आणि आपल्यातून दोन पुरूष साक्षी ठेवा. जर दोन पुरूष नसतील, तर एक पुरूष आणि दोन स्त्रियांना, ज्यांना तुम्ही साक्षीसाठी पसंत करून घ्याल[७]; कारण की एकीच्या भुलचूकीला दुसरी आठवण करून देईल[८] आणि साक्षीदारांना पाहिजे की जेव्हा ते बोलाविले जातील; तेव्हा (त्यांनी) नाकारू नये. आणि कर्जाला ज्याची मुदत निश्चित आहे, जरी ते लहान किंवा मोठे असले तरी, लिहिण्यास हयगय करू नका. अल्लाहतआला जवळ ही गोष्ट फारच न्यायसंगत आहे. आणि साक्षीलाही ठीक ठाक ठेवणारी, आणि शंका कुशंकेपासून पण जास्त वाचवणारी आहे[९]. हां! ही वेगळी गोष्ट आहे की, तो मामला नगद व्यापाराच्या स्वरूपात असेल जो आपसात तुम्ही घेणेदेणे करीत असाल, तर यांत तुमच्यावर याचे लिहून न घेण्यात काही गुनाह नाही. खरेदी विक्रीच्या वेळी सुद्धा साक्षीदार निश्चित करून घेत जा[१०]. आणि (लक्षात ठेवा की) न तर लिहिणाऱ्याला नुकसान पोहचवले जावे; न साक्षीदाराला[११] आणि जर तुम्ही असे केले तर हे तुमचे स्पष्ट आज्ञाभंजन आहे. अल्लाहतआलाला भ्या[१२]. अल्लाहतआला तुम्हाला शिक्षण देत आहे. आणि अल्लाहतआला प्रत्येक वस्तूला खूप जाणणारा आहे (२८२)

१) ही अशी सख्त तंबी आहे, जी आणखी कुणी अपराध करण्यावर दिली गेली नाही. याकरीता ह.अब्दुल्लाह बिन अब्बास ﵁ नी म्हटले आहे की, इस्लामी राज्यांत, जो मनुष्य व्याज सोडून देण्यास तयार होणार नाही; तर त्यावेळच्या खलीफाची ही जबाबदारी आहे की, त्याने त्याच्याकडून तौबा करवून घ्यावी (कारण तो उघड उघड अल्लाह आणि त्याच्या रसूल ﷺ शी,युद्धाचा प्रयत्न करीत आहे.) आणि यापासून माघार घेतली नाही तर, त्याचा शिरच्छेद करावा. (इब्ने कसीर)

२) तुम्ही जर मूळ रकमेपेक्षा जास्त वसूल कराल, तर हा तुमच्याकडून जुलूम होईल. आणि जर तुम्हाला मूळ रक्कम पण दिली जाणार नाही; तर हा तुमच्यावर जुलूम होईल.

३) अज्ञान काळात कर्जाची वसुली न झाल्यास व्याजावर व्याज मूळ रकमेवर वाढतच जाईल. ज्याने ती अल्प रक्कम डोंगरासारखी (मोठी) होऊन जात असे. आणि तिची परतफेड अशक्य होऊन जात असे. याच्या विरूद्ध अल्लाहतआलाने हुकूम दिला की, कोणी अडचणीत असेल, (व्याज घेणे तर दुरच, मूळ रक्कम घेण्यात सुद्धा) तर, सुबत्तेपर्यंत त्याला अवधी देऊन द्या. आणि जर कर्जच पूर्ण माफ करून द्याल तर हे जास्त उत्तम आहे. हदीसीमध्ये सुद्धा याचे फार महत्त्व वर्णन करण्यात आले आहे. किती फरक आहे या दोन्ही व्यवस्थेमध्ये? एक निव्वळ,अत्याचार, पाषाण हृदयता, आप्पलपोटेपणावर आधारित व्यवस्था, आणि दुसरी सहानुभूती,मदत आणि एक दुसऱ्याला आधार देणारी व्यवस्था. मुसलमानांनी स्वत:हून या बरकतवाल्या आणि दयेने परिपूर्ण अशा अल्लाहच्या व्यवस्थेला अंगिकारले नाही, तर त्यात इस्लामचा काय दोष? आणि अल्लाहवर काय आरोप? अरेरे! मुसलमान आपल्या धर्माच्या महत्वाला समजू शकले असते; आणि यावर आपल्या जीवन व्यवस्थेला निर्भर केले असते, तर किती बरे झाले असते!

४) काही सहाबा ﷺ च्या सांगण्याप्रमाणे हे कुरआन करीमचे शेवटचे म्हावाक्य आहे, जे नबी करीम ﷺ वर अवतरीत झाले. याच्यानंतर थोड्याच दिवसांत आपण ﷺ या जगातून कूच करून गेले (इब्ने कसीर)

५) जेव्हा व्याजावर आधारित व्यवस्थेच्या सक्तीला मनाई आणि दानधर्माला ताकीद करण्यात आली, तर अशा समाजात कर्जाची फार आवश्यकता पडते. कारण व्याज तर तसे पण हरामच आहे. आणि प्रत्येक माणूस दानधर्माची क्षमता ठेवीत नाही. त्याचप्रमाणे प्रत्येक मनुष्य सदका घेणे पसंत करीत नाही. मग आपल्या गरजा भागविण्यासाठी कर्जच घेणे बाकी रहाते. याचसाठी हदीसीमध्ये कर्ज देण्याचे मोठे प्रतिफल सांगण्यात आले आहे. तथापि कर्ज जशी न टाळता येणारी आवश्यकता आहे. तसेच त्यांत दुर्लक्ष व तदर्थ होणाऱ्या लढाई झगड्यालापण कारणीभूत आहे. म्हणून या महावाक्यामध्ये जिला 'आयतुद्दैन' म्हटले जाते. आणि जे कुरआनचे सर्वात लांब महावाक्य आहे. अल्लाहतआलाने कर्जाच्या संबंधात जरूरी सूचना दिल्या आहेत, की ही आवश्यक असलेली जरूरी लढाई झगड्याला कारणीभूत होऊ नये. याच्यासाठी एक आदेश हा देण्यात आला आहे की, मुदत ठरवून घ्या. दुसरे असे की, त्याला लिहून घ्या. तिसरे असे की, यावर दोन मुसलमान पुरूषांना किंवा एक पुरूष आणि दोन स्त्रियांना साक्षीदार बनवून घ्या.

६) याच्याने अभिप्रेत ऋणको (कर्ज घेणारा) आहे. म्हणजे त्याने अल्लाहला भित भित रकमेची खरी संख्या लिहवावी. त्यात कमी न करावे. पुढे सांगण्यात येत आहे की जर हा ऋणको कम अक्कल किंवा दुर्बल मूल किंवा पागल असेल तर त्याच्या सांभाळकर्त्याला पाहिजे की त्याने न्यायसंगत लिहवून घ्यावे. की त्यामुळे धनकोचे (कर्ज देणारा) नुकसान होऊ नये.

७) म्हणजे ज्याच्या धार्मिकतेवर आणि न्यायप्रियतेवर तुम्ही समाधानी असाल, शिवाय कुरआन करीमच्या या साफ महावाक्याने (नस्स) ठाऊक झाले की, दोन स्त्रियांची साक्ष, एका पुरूषाबरोबर आहे. तसेच पुरूषाशिवाय निव्वळ,एका स्त्रिची साक्षपण ग्राह्य नाही; शिवाय त्या प्रकरणात ज्यात स्त्रियांशिवाय कोणी माहितगार होऊ शकत नाही. या आदेशांत मतभेद आहेत की, वादीच्या एका शपथेसह दोन स्त्रियांच्या साक्षीवर निर्णय करणे योग्य आहे की, नाही? ज्याप्रमाणे एका पुरूषाच्या साक्षीवर निर्णय करणे योग्य आहे; जेव्हा दुसऱ्या साक्षीदाराच्या जागी वादी शपथ घेऊन घेईल. फुकहा-ए-अहनाफ जवळ असे करणे योग्य नाही. जेव्हा मोहद्देसीन, याला मान्य करणारे आहेत. कारण हदीसने एक साक्षीदार व शपथेसह निर्णय करणे सिद्ध आहे. आणि दोन स्त्रिया जेव्हा की एक पुरूष साक्षीदाराबरोबर आहेत, तर दोन स्त्रिया आणि शपथसह निर्णय करणे पण योग्य होईल. (फत्हुल कदीर)

८) हे एका पुरूषाच्या मुकाबल्यात दोन स्त्रिया निश्चित करण्याचे कारण आणि युक्ती आहे. म्हणजे स्त्री बुद्धीमत्तेत आणि स्मरणशक्तीत पुरूषांपेक्षा कमजोर आहे. (जसे की सहीह मुस्लीमच्या (एका) हदीसमध्ये स्त्रीला अपूर्ण बुद्धीची (नाकीसुल अक्ल) सांगण्यात आले आहे.) याच्यात स्त्रीला हलकी समजणे किंवा कमी लेखण्याचा उद्देश नाही (जसे काही लोक समजतात) परंतु एक नैसर्गिक दुर्बलतेचे वर्णन आहे. जे अल्लाहतआलाची प्रयुक्ती आणि मर्जी यावर अवलंबून आहे 'मुकाबरतन्' कोणी याला कबूल करणार नाही, तर गोष्ट वेगळी. परंतु सत्यता व घटनांच्या दृष्टीने हे रद्द केले जाऊ शकत नाही.

९) हे लिहिण्याचे फायदे आहेत की, याच्याने न्यायाची मागणी पुरी होईल. साक्ष पण योग्य राहील (की साक्षीदाराच्या मृत्यू किंवा नाहिसे होण्याच्या अवस्थेत लेखी कामास येईल) आणि शंका कुशंका पासून दोन्ही पक्ष सुरक्षित राहतील. कारण संशय आल्यावर लेखी बघून संशय दूर केला जाऊ शकतो.

१०) ही ती खरेदी विक्री आहे, ज्यात उधार असेल किंवा सौदा होऊन गेल्यावर सुद्धा फेरबदल होण्याचा धोका असेल. नाही तर याच्यापूर्वी नगद सौद्याला लिहिण्यापासून मुक्त करून देण्यात आले आहे. काहींनी या व्यापाराने घर,दुकान,बाग किंवा जनावरांचा व्यापार अभिप्रेत घेतला आहे. (अयसरूत्तफासीर)

११) यांना नुकसान पोहचवणे हे आहे की, लांब लांबच्या प्रदेशात त्यांना बोलाविले जावे की, ज्यामुळे त्यांच्या व्यग्रतेत खोळंबा किंवा कारभारात नुकसान व्हावे किंवा त्यांना खोटी गोष्ट लिहिण्यास किंवा याची साक्ष देण्यास भाग पाडले जावे.

१२) म्हणजे ज्या गोष्टीची ताकीद केली गेली आहे, त्यावर अंमलबजावणी करा. आणि ज्या गोष्टीपासून मना करण्यात आले आहे, त्यापासून स्वत:ला वाचवा.

وَاِنۡ كُنۡتُمۡ عَلٰى سَفَرٍ وَّلَمۡ تَجِدُوۡا كَاتِبًا فَرِهٰنٌ مَّقۡبُوۡضَةٌ ؕ
فَاِنۡ اَمِنَ بَعۡضُكُمۡ بَعۡضًا فَلۡيُؤَدِّ الَّذِى اؤۡتُمِنَ اَمَانَتَهٗ
وَلۡيَتَّقِ اللّٰهَ رَبَّهٗ ؕ وَلَا تَكۡتُمُوا الشَّهَادَةَ ؕ وَمَنۡ يَّكۡتُمۡهَا
فَاِنَّهٗۤ اٰثِمٌ قَلۡبُهٗ ؕ وَاللّٰهُ بِمَا تَعۡمَلُوۡنَ عَلِيۡمٌ ۝٢٨٣

आणि जर तुम्ही प्रवासात असाल आणि तुम्हाला लिहिणारा न भेटेल तर तारण गहाण ठेवून घ्या[१]. हां! जर आपसांत एक दुसऱ्यावर समाधानी व्हाल तर ज्याला अमानत दिली गेली आहे, ती त्याने परत करावी आणि अल्लाहतआलाला भित रहावे, जो त्याचा पालनकर्ता[२] आहे. आणि साक्षीला लपवू नका, आणि जो तिला लपवेल तो गुन्हेगार अंत:करणाचा आहे[३]. आणि जे काही तुम्ही करत आहात त्याला अल्लाहतआला खूप जाणतो (२८३)

لِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ ؕ وَاِنۡ تُبۡدُوۡا
مَا فِىۡۤ اَنۡفُسِكُمۡ اَوۡ تُخۡفُوۡهُ يُحَاسِبۡكُمۡ بِهِ اللّٰهُ ؕ
فَيَغۡفِرُ لِمَنۡ يَّشَآءُ وَيُعَذِّبُ مَنۡ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ
عَلٰى كُلِّ شَىۡءٍ قَدِيۡرٌ ۝٢٨٤

आकाशातील आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तू अल्लाहतआलाच्याच मालकीची आहे. तुमच्या मनांत जे काही आहे; त्याला तुम्ही जाहीर करा किंवा लपवा, अल्लाहतआला याचा हिशोब तुमच्याजवळून घेईल[४]. मग ज्याला इच्छेल त्याला माफ करेन; (आणि) ज्याला इच्छेल त्याला शिक्षा करेन आणि अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे (२८४)

اٰمَنَ الرَّسُوۡلُ بِمَاۤ اُنۡزِلَ اِلَيۡهِ مِنۡ رَّبِّهٖ وَالۡمُؤۡمِنُوۡنَ ؕ
كُلٌّ اٰمَنَ بِاللّٰهِ وَمَلٰٓـئِكَتِهٖ وَكُتُبِهٖ وَرُسُلِهٖ لَا نُفَرِّقُ
بَيۡنَ اَحَدٍ مِّنۡ رُّسُلِهٖ ۚ وَقَالُوۡا سَمِعۡنَا وَاَطَعۡنَا
غُفۡرَانَكَ رَبَّنَا وَاِلَيۡكَ الۡمَصِيۡرُ ۝٢٨٥

पैगंबराने ईमान आणले त्या गोष्टीवर जी अल्लाहकडून त्याच्याकडे अवतरीत झाली आणि विश्वासूंनीपण ईमान आणले या सर्वांनी अल्लाहतआला आणि त्याच्या देवदूतांवर आणि त्याच्या पुस्तकांवर आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान आणले. त्याच्या पैगंबरांमध्ये आम्ही भेदाभेद करीत नाही[५]. त्यांनी सांगून टाकले की, आम्ही ऐकले; व आज्ञापालन केले. आम्ही तुझी क्षमा याचना करीत आहोत आणि हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास तुझ्याचकडे परतून येणे आहे. (२८५)

لَا يُكَلِّفُ اللّٰهُ نَفۡسًا اِلَّا وُسۡعَهَا ؕ لَهَا مَا كَسَبَتۡ
وَعَلَيۡهَا مَا اكۡتَسَبَتۡ ؕ رَبَّنَا لَا تُؤَاخِذۡنَاۤ اِنۡ
نَّسِيۡنَاۤ اَوۡ اَخۡطَاۡنَا ۚ رَبَّنَا وَلَا تَحۡمِلۡ عَلَيۡنَاۤ اِصۡرًا
كَمَا حَمَلۡتَهٗ عَلَى الَّذِيۡنَ مِنۡ قَبۡلِنَا ۚ رَبَّنَا وَلَا تُحَمِّلۡنَا
مَا لَا طَاقَةَ لَنَا بِهٖ ۚ وَاعۡفُ عَنَّا ۚ وَاغۡفِرۡ لَنَا ۚ
وَارۡحَمۡنَا ۚ اَنۡتَ مَوۡلٰٮنَا فَانۡصُرۡنَا عَلَى الۡقَوۡمِ الۡكٰفِرِيۡنَ ۝٢٨٦

अल्लाहतआला कोण्याही जीवावर त्याच्या ताकदीपेक्षा जास्त बोझा टाकत नाही. जे चांगले काम तो करील ते त्याच्याचसाठी आणि जी वाईट कामे करेन, ती त्याच्यावरच आहेत. हे आमच्या पाललनकर्त्या! जर आम्ही विसरून जाऊ किंवा आमच्याकडून चूक होऊन जाईल; तर आमची पकड करू नकोस. हे आमच्या पालकर्त्या! आमच्यावर ते ओझे टाकू नकोस, जे आमच्यापूर्वीच्या लोकांवर (तू) टाकले होते. हे आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर ते ओझे टाकू नकोस जे उचलण्याची आम्हास ताकद नसेल. आणि आम्हास माफ कर आणि आम्हास क्षमा कर, आणि आमच्यार दया कर, तू्च आमचा मालक आहेस (आणि) आम्हास काफिर लोकांवर वर्चस्व प्राप्त करून दे (२८६)

१) जर प्रवासात कर्ज घेण्याचा प्रसंग उद्‌भवला आणि तेथे कागद, पेन्सील आणि लिहिणारा न मिळेल त्यावेळी काय करावे? हे सांगण्यात येत आहे की, कर्ज घेणाऱ्याने कुणी वस्तू धनको जवळ (कर्ज देणारा) तारण ठेवून द्यावी. ह्याने गहाण ठेवण्याच्या पद्धती योग्य असल्याचे सिद्ध होते. नबी ﷺ नी सुद्धा आपले चिलखत एका यहूद्याकडे गहाण ठेवले होते (सही बुखारी.) तथापि गहाण ठेवलेली वस्तू अशी असेल की, ज्याने नफा मिळत असेल तर, त्या नफ्याचा हकदार मालक राहील, आणि गहाण ठेवणारा राहणार नाही. तथापि यावर गहाण ठेवणाऱ्याचा काही खर्च होत असेल तर यातून तो आपला खर्च वसूल करू शकतो. शिल्लक राहिलेला नफा मालकाला देणे जरूरीचे आहे.

२) म्हणजे जर एक दुसऱ्यावर भरोसा असेल, तर गहाण ठेवल्या शिवायही उसनवारी मामला करू शकतात. अमानतने येथे अभिप्रेत कर्ज आहे. अल्लाहला भीत भीत हे योग्य प्रकारे अदा केले जावे.

३) साक्षीला लपविणे कबीरा गुनाह (मोठे पाप) आहे. यासाठी कडक तंबी येथे कुरआनांत व हदीसीमध्ये वर्णन करण्यात आली आहे. याचसाठी खरी साक्ष देण्याचे महत्त्वपण मोठे आहे. सही मुस्लिमची हदीस आहे, नबी ﷺ नी सांगितले, ''तो सर्वात उत्कृष्ट साक्षीदार आहे, जो साक्ष मागण्याचे पहिले, स्वत:हून साक्ष देण्यास हजर होऊन

जाईल.'' (सहीह मुस्लीम,इब्ने कसीरच्या हवाल्याने) ''काय मी तुम्हाला तो साक्षीदार दाखवून न द्यावा, जो अत्यंत वाईट साक्षीदार आहे असे ते लोक आहेत जे साक्ष देण्याच्या मागणीच्या पूर्वीच साक्ष देतात''. (स. बुखारी) म्हणजे खोटी साक्ष देऊन गुनाहे कबिरा करणारे ठरतात. तसेच या महावाक्यात, अंतःकरणाचा खास उल्लेख करण्यात आला आहे. यासाठी की, लपविणे, मनाचे काम आहे. कारण मन सर्व अवयवांचा सरदार आहे. आणि हा एक मांसाचा तुकडा (हृदय) असा आहे की जर, हे बरोबर असेल तर सर्व शरीर बरोबर (ठिक ठिक) रहाते. आणि जर त्याच्यात खराबी आली तर सर्व शरीर खराब होऊन जाते. (सहीह बुखारी)

४) हदीसमध्ये येते जेव्हा हे महावाक्य, अवतीर्ण झाले तेव्हा सहाबा कराम ﷺ फारच परेशान झाले. त्यांनी पैगंबर ﷺ च्या दरबारात हजर होऊन अर्ज केला की हे अल्लाहच्या रसूल! नमाज,उपवास,जकात आणि जिहाद वगैरे सर्व कर्मे ज्यांचा आम्हाला आदेश देण्यात आला आहे, त्यावर आम्ही अंमलबजावणी करतो; कारण की ती आमच्या ताकदीबाहेर नाही. परंतु मनांत निर्माण झालेले विचार आणि वाईट कल्पनावर आमचा ताबा नाही. कारण की ते मनुष्याच्या ताकदीच्या पलीकडे आहेत. परंतु यांच्यावर सुद्धा अल्लाहतआलाने विचारपूस करण्याचे जाहीर करून दिले आहे. नबी ﷺ नी. सांगितले ''सध्यातरी तुम्ही ''समेअना व अत्अना'' (आम्ही ऐकले आणि मान्य केले) हेच म्हणा. म्हणून अल्लाहतआलाने सहाबा ﷺ च्या ऐकण्याच्या आणि मान्य करण्याच्या भावनेकडे पाहत, या महावाक्याला ''लायुकल्लीफुल्लाहू नफसन् इल्ला उसअहा'' (अल्लाहतआला कोण्या जीवावर त्याच्या ताकदीपेक्षा जास्त बोझा टाकत नाही) ने रद्द करून टाकले; (इब्ने कसीर व फत्हुल कदीर) सहीहैन व सुनन अर्बा ची ही हदीसपण याचे समर्थन करते ''अल्लाहतआलाने, माझ्या उम्मतीच्या मनांत येणाऱ्या विचारांना माफ करून टाकले आहे.'' परंतु त्या विचारांवर पकड होईल; जे जिभेने जाहीर केले जातील ''किंवा त्यांच्यावर अंमल केला जाईल.'' यामुळे ठाऊक झाले की, मनांत येणारे विचारांवर वास्तपूस (मुहासिबा) होणार नाही. फक्त त्यांच्यावर विचारपूस होईल. जे पक्क्या इराद्यांत आणि कृतीत बदलून जातील किंवा कर्माचे रूप धारण करतील. याच्या उलट इमाम इब्ने जरीर तबरी चा विचार आहे की, हे महावाक्य रद्द झालेले नाही. कारण की वास्तपूस सजा देण्याला आवश्यक नाही. म्हणजे असे नाही की, अल्लाहतआला ज्याची पण वास्तपूस करेल, त्याला शिक्षापण जरूर करेन. परंतु अल्लाहतआला वास्तपूस तर प्रत्येकाची करेल परंतु पुष्कळसे लोक असे असतील की वास्तपूस केल्यानंतर, अल्लाहतआला त्यांना क्षमा करून टाकेन, उलट काही बरोबर तर असा मामला करीन की, त्याच्या एक एक गुनाहाची आठवण करून देवून त्यावर त्याची मान्यता घेईन; आणि मग सांगेन की मी इहलोकांत यांच्यावर आच्छादन टाकून ठेवले. जा आज मी यांना (गुन्ह्यांना) माफ करीत आहे. (ही हदीस सहीह बुखारी व मुस्लीम वगैरेमध्ये आहे. इब्ने कसीरच्या हवाल्याने) आणि काही उलेमांनी (धर्मपंडीत) सांगितले आहे की येथे नस्ख 'इस्तलाही' च्या अर्थात नाही. परंतु काही वेळा याला स्पष्टीकरण करण्याच्या अर्थात पण उपयोगात आणले जाते. तात्पर्य सहाबा कराम ﷺ च्या मनांत जी शंका, या महावाक्यामुळे निर्माण झाली होती,तिला महावाक्य 'लायुकल्लीफुल्लाहू नफसान' आणि हदीस ''इन्नल्लाह तजावजा ली अन् उम्मती'' वगैरेने दूर करून देण्यात आले. याप्रमाणे 'नासिख मन्सुख' मानण्याची आवश्यकता बाकी रहात नाही.

तफसीर १ चा उर्वरीत भाग

**एक महत्त्वपूर्ण खुलासा:–** काही रिवायतीत येते की, पुण्याच्या इराद्यावरच एक पुण्य लिहिले जाते आणि त्याच्या केल्यानंतर कमीत कमी दहा प्रतिशत आणि जास्तीत जास्त सातशे प्रतिशत अथवा यापेक्षाही अधिक मोबदला दिला जातो. आणि जो कोण्या वाईट कृत्याचा इरादा करतो, परंतु त्याला करत नाही तर त्यावरही त्याला एक पुण्य (नेकी) दिले जाते. तथापि, तो त्या वाईट कृत्याचा अवलंब करत असेल, तर मग एक गुन्हा लिहिला जातो. (स. बुखारी) या हदीसीने असे माहित होते की, वाईट कृत्य (पाप) त्यावेळेपर्यंत लिहिले जात नाही, जोपर्यंत ते वाईट कृत्य केले जात नाही. फक्त वाईट कृत्य करण्याची कामना धरणे गुन्हा नाही. तथापि वरील प्रमाणे वाईट कृत्याची कामना धरण्यालाही गुन्हा (पाप) करार देण्यात आला आहे. तर सलफचे बहुमत (बहुसंख्यांक) आणि धर्मपंडितांनी म्हटले आहे की इच्छा (कामना) चे विविध दर्जे आहेत. एक ते आहे ज्याला वसवसा म्हटले जाते, की मनात विचार आला आणि निघून गेला. दुसरे त्याहून मोठे तरद्दूद आहे. कधी त्याच्या

करण्याचा इरादा (इच्छा) करतो आणि नंतर सोडून देतो. पुन्हा इरादा करतो, पुन्हा सोडून देतो. त्यावर पक्क्या इराद्याने कायम राहत नाही. याहूनही अधिक हम्म (चिंतन व मनन नंतरची अवस्था) आहे, की त्याचेकडे त्याचा झुकाव (ओढ) असतो. त्याच्याशी इर्ष्या बाळगत नाही. अपितु त्याच्या करण्याची कामना बाळगतो. आणि चौथा प्रकार (दर्जा) त्याहून अधिक आहे की, त्याचेकडे ओढ असतो. त्याच्याशी इर्ष्या बाळगत नाही, आणि त्याच्या करण्याचा पक्का निश्चय करून टाकतो. हे मनन व चिंतनाची अंतिमसीमा आहे. याला अज्मे समीम (अगदी पक्का निश्चय) म्हणतात. पहिले तीन दर्जे (प्रकार) माफ आहेत. आणि चौथा (म्हणजे अज्मे समीम) पकड करण्यालायक आहे. आणि गुन्हयाच्या पक्क्या इराद्यावर एक गुन्हा (बुराई) लिहिला जाईल. तथापि हे जरूरी नाही की, ज्या वाईट कृत्याचा त्याने इरादा केला असेल, अगदी तसाच गुन्हा त्याच्या नावावर लिहिला जाईल. जसे कोणी व्यक्ती कुणाला वाईट कृत्याबाबत आदेश देईल. परंतु त्यावर पूर्णपणे कादिर (हावी) झाल्यानंतर तो त्याचा कोण्या अडथळ्याच्या सबबीवर पक्का निश्चय करता कामा नये. हुक्मे मज़कूर (दिलेला आदेश) च्या कारणाने तो गुन्हेगार तर होईल, तो त्या गुन्हयाच्या करणाऱ्यांत सामील न होवो. या मौकिफ (संदर्भिय कथनाची) ची अनेक दलीले आहेत. जसे एका हदीसीत आहे, नबी ﷺ नी म्हटले जेव्हा दोन मुसलमान तलवारींसह समोरासमोर उभे राहतात, तर खुनी व मृत दोन्हीही नरकाग्नीत जातील. सहाबा ﷺ नी विचारले, खुन्याचा नरकाग्नीत (जहन्नमी) जाणे तर ठीक आहे, परंतु मृत व्यक्ती (जहन्नमी) नरकाग्नीत का जावा? आपण ﷺ नी म्हटले, यासाठी की, हा देखील आपल्या साथीदाराला ठार करण्याची इच्छा बाळगून होता. (म्हणजे त्याच्या वधाचा मनात पक्का निश्चय ठेवत होता) यावरून असे माहित होते की, पक्का निश्चय हा अंतः करणाचे कृत्य आहे. जे वसवसा पासून वेगळे व पकड होण्याच्या लायक आहे. (फत्हुल बारी)

५) या महावाक्यात पुन्हा, त्या गोष्टींवर ईमान आणण्याचा उद्देश आहे. ज्यांच्यावर ईमानवाल्यांना,ईमान ठेवण्याचा हुकूम देण्यात आला आहे. आणि याच्या पुढील महावाक्य 'लायुकल्लीफुल्लाहू'' मध्ये अल्लाहतआलाची दया आणि कनवाळूवृत्ती आणि त्याची कृपा याची चर्चा आहे; की त्याने मनुष्यांना कोण्या अशा गोष्टीने सजविले (मुकल्लफ) नाही, जी त्याच्या ताकदीच्या बाहेर असेल. या दोन्ही आयातींचे हदीसमध्ये मोठे श्रेष्ठत्व आले आहे. नबी ﷺ नी सांगितले ''जो मनुष्य सू.बकर: ची शेवटची दोन महावाक्ये रात्री पठण करून घेतो, तर ती याला पुरेशी होऊन जातात'' (स.बुखारी, स.मुस्लिम) म्हणजे या अंमलमुळे अल्लाहतआला त्याचे सरंक्षण करतो. दुसऱ्या हदीसमध्ये आहे. नबी ﷺ ला मेअराजच्या रात्रीत, ज्या तीन गोष्टी मिळाल्या; त्यातून एक सू.बकरची ही शेवटची दोन महावाक्ये पण आहेत (स.मुस्लीम) काही उल्लेखांत असेपण आले आहे की, या अध्यायाचे शेवटचे महावाक्य, आपण ﷺ ला एका खजिन्यातून दिले गेले, जो अर्ष इलाहीच्या (महासिंहासन) खाली आहे. आणि ही आयात आपल्या ﷺ शिवाय कोण्या दुसऱ्या पैगंबरास देण्यात आली नाही. (अहमद,निसाई,तबरानी,बैहकी,हाकीम,दारमी वगैरे दुर्रे मन्सूर) हजरत मआज ﷺ या आयातच्या संपण्यानंतर 'आमीन' म्हणत असत (इब्ने कसीर).

महावाक्ये २०० (३)सू. आले इमरान[१] रुकूअ २०

آیاتها ۲۰۰ (۳) سُوْرَةُ اٰلِ عِمْرٰنَ مَدَنِیَّةٌ (۸۹) رکوعاتها ۲۰

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِیْمِ○

الٓمّٓ ۚ﴿١﴾

**अलिफ लाम मीम ①**

اَللّٰهُ لَاۤ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۙ الْحَیُّ الْقَیُّوْمُ ؕ﴿٢﴾

**अल्लाहतआला तो आहे, ज्याच्या शिवाय अन्य कोणी उपास्य नाही, जो जिवंत आणि सगळ्यांचा सांभाळकर्ता आहे[१] ②**

نَزَّلَ عَلَیْكَ الْكِتٰبَ بِالْحَقِّ مُصَدِّقًا لِّمَا بَیْنَ یَدَیْهِ وَ اَنْزَلَ التَّوْرٰىةَ وَ الْاِنْجِیْلَ ۙ﴿٣﴾

**ज्याने आपणांवर सत्यासह या पुस्तकाला अवतीर्ण केले आहे.[२] जे आपल्या पूर्वीच्या (पुस्तकांना) खरे ठरवणारे आहे. त्यानेच याच्यापूर्वी तौरात आणि इंजीलला उतारले होते ③**

مِنْ قَبْلُ هُدًى لِّلنَّاسِ وَ اَنْزَلَ الْفُرْقَانَ ؕ اِنَّ الَّذِیْنَ كَفَرُوْا بِاٰیٰتِ اللّٰهِ لَهُمْ عَذَابٌ شَدِیْدٌ ؕ وَ اللّٰهُ عَزِیْزٌ ذُو انْتِقَامٍ ﴿٤﴾

**याच्यापूर्वी लोकांना मार्गदर्शन करणारे बनवून,[३] आणि कुरआनपण त्यानेच उतारले[४]. जे लोक अल्लाहतआलाच्या निशाण्यांना नाकारतात, त्यांच्यासाठी कडक शिक्षा आहे. आणि अल्लाहतआला समर्थ आणि बदला घेणारा आहे ④**

اِنَّ اللّٰهَ لَا یَخْفٰى عَلَیْهِ شَیْءٌ فِی الْاَرْضِ وَ لَا فِی السَّمَآءِ ؕ﴿٥﴾

**खचित्च, अल्लाहतआलासाठी पृथ्वी आणि आकाशाची कुठलीही वस्तू गुप्त नाही ⑤**

हा अध्याय मदनी आहे. याची सर्व महावाक्ये वेगवेगळ्या वेळी मदिनेतच अवतीर्ण झाली आहेत. आणि याचा सुरवातीचा भाग म्हणजे ८३ महावाक्यांपर्यंत खिरस्त्यांच्या नजरानच्या शिष्टमंडळाच्या बाबतीत अवतीर्ण झाला आहे. हे ९ हिजरीमध्ये नबी ﷺ च्या सेवेत हजर झाले होते. खिरस्त्यांनी येऊन नबी ﷺ बरोबर आपल्या खिरस्ती श्रद्धा आणि इस्लामच्या बाबतीत चर्चा आणि वादविवाद केला. ज्यांचे खंडन करून त्यांना 'मुबाहिला' चे आवाहन पण देण्यात आले. ज्याचा खुलासा पुढे येईल. याच पार्श्वभूमिवर कुरआन करीमच्या या महावाक्यांवर त्या दृष्टीने विचार केला जावा.

१) 'हय्य व कय्युम' अल्लाहतआलाची खास विशेषणे आहेत. 'हय्य' चा अर्थ तो सदैवपासून आहे आणि सदैवासाठी राहील. त्याला मृत्यू आणि विनाश नाही. कय्युमचा अर्थ साऱ्या विश्वाला कायम ठेवणारा,संरक्षणकर्ता,देखभाल करणारा, सारे विश्व त्याच्यावर अवलंबून तो कोणावर अवलंबून नाही. खिरस्ती ह.ईसा عليه السلام ला अल्लाह किंवा अल्लाहचा पुत्र किंवा तीन मधून एक असे मानत होते. जणू यांना सांगण्यात येत आहे, जेव्हा ह.ईसा. عليه السلام पण अल्लाहची निर्मिती आहे आणि आईच्या पोटी जन्माला आले आणि त्यांचा जन्मकाळ पण विश्वनिर्मितीच्या पुष्कळ काळानंतर आहे. तर मग ते अल्लाहचा पुत्र किंवा अल्लाह कशाप्रकारे होऊ शकतात? जर तुमची श्रद्धा (अकिदा) बरोबर असती तर त्यांना मखलूक (अल्लाहची निर्मिती) च्या ऐवजी उपास्यत्वाच्या वैशिष्टांनी परिपूर्ण आणि फार प्राचीन असावयास पाहिजे होते. तसेच त्यांना मृत्यूपण यावयास नको; परंतु तो एक समय येईल की त्यांना सुद्धा मृत्यू येईल. आणि खिरस्त्यांचे म्हणण्यानुसार त्यांचा मृत्यूपण होऊन चुकला. हदीसमध्ये येते की, तीन महावाक्यात अल्लाहचे 'इस्मेआजम' आहे. ज्याचे मार्फत दुआ केली गेली तर ती रद्द होत नाही. एक हेच आले इमरानचे महावाक्य, दुसरे आयतल कुर्सी मध्ये ''अल्लाहु लाईलाहा इल्लाहु हुवल हय्युल कय्युम'', तिसरे सू. ताहामध्ये ''वआनातील वुजुह लिल हय्युल कय्युम'' (इब्ने कसीर-तफसीर आयतल कुर्सी)

२) म्हणजे याच्या अल्लाहकडून अवतरीत होण्यात काही संशय नाही. पुस्तकाने अभिप्रेत, कुरआन मजीद आहे.

३) याच्यापूर्वी पैगंबरावर जी पुस्तके अवतीर्ण झाली हे पुस्तक त्यांना मान्यता देत आहे. म्हणजे ज्या गोष्टी त्यांच्यात नमूद होत्या त्यांची सत्यता आणि त्यांच्यात वर्णन केलेल्या भविष्यवाण्याला मान्य करते. ज्याचा स्पष्ट अर्थ असा आहे की, हे कुरआन करीमपण त्याच व्यक्तीत्वाकडून अवतीर्ण झाले आहे, ज्याने पूर्वी पुष्कळशी पुस्तके अवतीर्ण केली. जर हे कोण्या दुसऱ्याकडून किंवा मानवी प्रयत्नांचा परिणाम असता तर यांच्यात एक दुसऱ्यांत (बाहम) समतोल पणाच्या ऐवजी विरोधाभास असता.

४) म्हणजे आपआपल्या काळी, तौरात आणि इंजीलपण खचितच् लोकांच्या मार्गदर्शनाचे साधन होते. यासाठी की, त्यांच्या अवतरणाचा उद्देशपण हाच होता. तथापि याच्यानंतर, 'व अनजलल फुरकाना' दोन वेळा सांगून खुलासा केला की आता तौरात आणि इंजीलचा जमाना संपला आहे. आता कुरआन अवतरीत होऊन चुकले आहे, ते सत्य आणि असत्याला स्पष्ट करणारे आहे. याला सत्य मानल्याशिवाय अल्लाहजवळ कोणी मुसलमान आणि विश्वासू नाही.

هُوَ الَّذِيْ يُصَوِّرُكُمْ فِي الْاَرْحَامِ كَيْفَ يَشَآءُ ؕ لَاۤ اِلٰهَ اِلَّا هُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ۝٦

**तो आईच्या पोटांत तुमच्या छबी,ज्या प्रकारे इच्छितो बनवितो[१]. त्याच्याशिवाय (अन्य) कोणी उपास्य नाही; तो सामर्थ्यवान आणि बुद्धीवान आहे ⑥**

هُوَ الَّذِيْۤ اَنْزَلَ عَلَيْكَ الْكِتٰبَ مِنْهُ اٰيٰتٌ مُّحْكَمٰتٌ هُنَّ اُمُّ الْكِتٰبِ وَاُخَرُ مُتَشٰبِهٰتٌ ؕ فَاَمَّا الَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ زَيْغٌ فَيَتَّبِعُوْنَ مَا تَشَابَهَ مِنْهُ ابْتِغَآءَ الْفِتْنَةِ وَابْتِغَآءَ تَاْوِيْلِهٖ ۚ وَمَا يَعْلَمُ تَاْوِيْلَهٗۤ اِلَّا اللّٰهُ ؔ وَالرّٰسِخُوْنَ فِي الْعِلْمِ يَقُوْلُوْنَ اٰمَنَّا بِهٖ ۙ كُلٌّ مِّنْ عِنْدِ رَبِّنَا ۚ وَمَا يَذَّكَّرُ اِلَّاۤ اُولُوا الْاَلْبَابِ ۝٧

**तोच अल्लाहतआला आहे, ज्याने तुझ्यावर पुस्तक उतारले, ज्यात स्पष्ट आणि स्थिर महावाक्ये आहेत. जे मूळ पुस्तक आहे. आणि काही मोघम (की ज्यातून अनेक अर्थ निघतात) वाक्ये आहेत[२]. मग ज्यांच्या मनांत वाकडेपणा (कजी) आहे; ते तर या मोघम वाक्यांचे मागे लागून जातात (की) मतभेद पैदा करावा आणि स्वत:ची इच्छा (लालसा) प्राप्त करून घ्यावी. वास्तविक पाहता त्यांची खरी लालसा अल्लाहतआला शिवायकोणी जाणत नाही[३] आणि परिपूर्ण व मजबूत ज्ञानवाले हेच म्हणतात की, आम्ही तर याच्यावर ईमान आणून चुकलो; हे आमच्या पालनकर्त्याकडून आहे. आणि उपदेश तर फक्त बुद्धीमानच ग्रहण करतात ⑦**

१) सुंदर किंवा कुरूप, स्त्री किंवा पुरूष, पुण्यवान किंवा पापी, अपूर्ण निर्मिती किंवा पूर्ण निर्मिती जेव्हा आईच्या पोटांत हे सर्व बदल फक्त अल्लाहतआलाच करणारा आहे. तर ह. ईसा عليه السلام उपास्य (इलाह) कशाप्रकारे होऊ शकतात ? जे स्वत: सुद्धा याच निर्मितीचा प्रवास पार करून या जगात आले आहेत, ज्याचा क्रम अल्लाहतआलाने आईच्या पोटांत कायम केला आहे.

२) 'मुहकमात' ने अभिप्रेत ती महावाक्ये आहेत, ज्याच्यात चांगल्या कामांचा आदेश देणे व वाईट कामांपासून रोकणे, अहकाम व मसाईल , गोष्टी व हकीकत आहेत. ज्यांचा खुलासा स्पष्ट आणि स्थित आहे; आणि त्यांच्या समजण्यात काही अडचण येत नाही. याच्या उलट ''आयात मुतशाबिहात'' आहेत. उदाहरणार्थ अल्लाहचे व्यक्तीत्व, कज़ा व कद्र (भाग्य) स्वर्ग, नर्क, देवदूत वगैरे म्हणजे या गोष्टी बुद्धीच्या पलीकडे आहेत. ज्यांचे बारीकपण व वास्तवता समजण्यास मानवी बुद्धी असमर्थ असेल, त्यांच्यात अशा एका सारख्या असण्यात व जाहीर अर्थावरून कुण्या गोष्टीला फिरवण्याची शक्यता असावी (इश्तबाह व ताविल) किंवा कमीत कमी असे गोलगोल असावे की, सामान्यांना घोटाळ्यात पडणे शक्य होईल. यासाठी पुढे सांगण्यात येत आहे की, ज्याच्या मनात वक्रता (कजी) असते ते ''आयात मुतशाबिहात'' च्यामागे लागलेले असतात. आणि यांच्या करवी ते झगडे फसाद करतात. जसे खिस्ती आहेत. कुरआनाने ह. ईसा عليه السلام ला अल्लाहचा सेवक व पैगंबर म्हटले आहे. ही स्पष्ट आणि पक्की गोष्ट आहे. परंतु खिस्तीला सोडून कुरआन करीममध्ये ह. ईसा عليه السلام ला. 'रूहुल्लाह' व 'कलेमतुल्लाह' जे म्हटले आहे. याच्याने ते आपल्या मार्गभ्रष्ट करणाऱ्या श्रद्धांवर चुकीचा आधार घेतात. हीच स्थिती बिदअतवाल्यांची आहे. कुरआनाच्या (अगदी) स्पष्ट श्रद्धांच्या (अकाईद) उलट अहले बिदअतने ज्या मार्गभ्रष्ट करणाऱ्या श्रध्दा घडवून ठेवल्या आहेत. ते याच 'मुतशाबिहात'ला मूळ बनवितात. आणि केव्हा केव्हा 'मुहकमात' ला सुद्धा आपल्या तत्त्वज्ञानाच्या आधाराचा अव्यापारेणु व्यापार (गोरखधंदा) ने 'मुत्तशाबिहात' बनवून टाकतात. (अआजनल्लाह मिनहू) याच्या उलट खऱ्या अकिदावाला मुसलमान, 'मुहकमात' वर अमल करतो. आणि 'मुत्तशाबिहात' च्या अनुषंगिक अर्थाला (मफहूम) पण (जर त्यांच्यात इशतबाह असेल) 'मुहकमात' च्या प्रकाशात, समजण्याचा प्रयत्न करतो, कारण की, कुरआनने त्यांनाच 'मूळ पुस्तक' ठरविले आहे. ज्यामुळे तो फितण्यापासून पण सुरक्षित राहतो. आणि श्रद्धांच्या मार्ग भ्रष्टतेपासून पण. जआलनल्लाह मिनहुम.

३) 'तावील' चा एक अर्थ तर आहे ''कोण्या गोष्टीची मूळ हकीकत'' 'तावील' चा दुसरा अर्थ आहे. ''कुठल्या गोष्टीचे भाष्य भवितव्य, व वर्णन व खुलासा.'' 'तावील' चे दोन्ही अर्थ कुरआन करीमच्या उपयोग करण्याने सिद्ध आहेत (इब्ने कसीर)

رَبَّنَا لَا تُزِغْ قُلُوبَنَا بَعْدَ إِذْ هَدَيْتَنَا وَهَبْ
لَنَا مِنْ لَّدُنْكَ رَحْمَةً ۚ إِنَّكَ أَنْتَ الْوَهَّابُ ﴿٨﴾

हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास हिदायत दिल्यानंतर आमची अंत:करणे वक्र करू नकोस आणि आम्हास आपल्याकडून दया दे. खचितच् तू, महान दाता आहेस (८)

رَبَّنَا إِنَّكَ جَامِعُ النَّاسِ لِيَوْمٍ لَّا رَيْبَ فِيهِ ۚ
إِنَّ اللَّهَ لَا يُخْلِفُ الْمِيعَادَ ﴿٩﴾

हे आमच्या पालनकर्त्या! तू खचितच् एके दिवशी लोकांना (एकत्र) गोळा करणार आहेस. ज्याच्या येण्यात कुठलीच शंका नाही. खचितच् अल्लाहतआला वायद्याचे विरुद्ध करीत नसतो (९)

إِنَّ الَّذِينَ كَفَرُوا لَنْ تُغْنِيَ عَنْهُمْ أَمْوَالُهُمْ وَلَا
أَوْلَادُهُمْ مِّنَ اللَّهِ شَيْئًا ۖ وَأُولَٰئِكَ هُمْ وَقُودُ النَّارِ ﴿١٠﴾

काफिरांना त्यांची संपत्ती व त्यांची संतती, अल्लाहतआलाच्या शिक्षेपासून वाचविण्यासाठी काहीच कामा येणार नाही. हे तर नरकाग्नीचे इंधनच आहेत (१०)

كَدَأْبِ آلِ فِرْعَوْنَ ۙ وَالَّذِينَ مِنْ قَبْلِهِمْ ۚ كَذَّبُوا
بِآيَاتِنَا فَأَخَذَهُمُ اللَّهُ بِذُنُوبِهِمْ ۗ وَاللَّهُ شَدِيدُ الْعِقَابِ ﴿١١﴾

जशी फिरऔनवाल्यांची गत झाली आणि त्यांची जे त्यांच्यापूर्वी होते, त्यांनी आमच्या निशाण्यांना नाकारले मग अल्लाहतआलानेपण त्यांना त्यांच्या अपराधांवर पकडले. आणि अल्लाहतआला कडक शिक्षा करणारा आहे (११)

قُلْ لِّلَّذِينَ كَفَرُوا سَتُغْلَبُونَ وَتُحْشَرُونَ إِلَىٰ
جَهَنَّمَ ۚ وَبِئْسَ الْمِهَادُ ﴿١٢﴾

काफिरांना सांगून टाका की, तुम्ही लवकरच पराजीत केले जाल[१]. आणि नरकाग्नीकडे गोळा केले जाल. आणि ते (फार) वाईट अंथरूण आहे (१२)

قَدْ كَانَ لَكُمْ آيَةٌ فِي فِئَتَيْنِ الْتَقَتَا ۖ فِئَةٌ تُقَاتِلُ
فِي سَبِيلِ اللَّهِ وَأُخْرَىٰ كَافِرَةٌ يَرَوْنَهُمْ مِّثْلَيْهِمْ
رَأْيَ الْعَيْنِ ۚ وَاللَّهُ يُؤَيِّدُ بِنَصْرِهِ مَنْ يَشَاءُ ۗ إِنَّ
فِي ذَٰلِكَ لَعِبْرَةً لِّأُولِي الْأَبْصَارِ ﴿١٣﴾

खचितच् तुमच्या समजण्यासाठी (भारी) निशाणी होती. त्या (जेव्हा) दोन गटांत जे एकमेकांशी भिडले होते. एक गट तर अल्लाहतआलाच्या मार्गात लढत होता, आणि दुसरा गट काफिरांचा होता, ते त्यांना डोळ्यांनी आपल्यापेक्षा दुप्पट दिसत[२] होते. आणि अल्लाहतआला ज्याला इच्छितो (त्याला) आपल्या मदतीने मजबूत करून देतो. खचितच् यांत डोळे असणाऱ्यांना मोठाच धडा आहे (१३)

१) येथे काफिरांनी अभिप्रेत यहूदी आहेत. आणि ही भविष्यवाणी लवकरच पूर्ण झाली. त्याप्रमाणे 'बनु कैनुकाअ' व 'बनुनजीर' ना हद्दपार करण्यात आले आणि 'बनुकुरैजा' ना ठार मारण्यात आले. नंतर खैबरवर विजय मिळाला आणि सर्व यहूद्यांवर जिझीया लागू करण्यात आला (फत्हुल कदीर)

२) म्हणजे प्रत्येक गट दुसऱ्या गटाला आपल्यापेक्षा दुप्पट दिसत होता. काफिरांची संख्या एक हजाराच्या जवळपास होती. त्यांना मुसलमान दोन हजाराच्या जवळपास दिसत होते. याच्याने उद्देश त्यांच्या मनांत मुसलमांनाचाच धाक बसविणे होते. आणि मुसलमानांची संख्या तिनशेच्यावर काही (किंवा तिनशे तेरा) होती. त्यांना काफिर ६०० आणि ७०० च्या दरम्यान दिसत होते. वास्तविक त्यांची मूळ संख्या हजारच्या जवळपास (तिप्पट) होती. याच्याने मुसलमानांच्या इराद्यात आणि हिंमतीत वाढ करण्याचा होता. आपल्या पेक्षा तिप्पट पाहून शक्य होते की, भिऊन जातील. जेव्हा तिप्पट ऐवजी दुप्पट दिसले तर त्यांची हिंमत कमी झाली नाही परंतु, ही दुप्पट दिसण्याची स्थिती सुरवातीला होती. मग जेव्हा दोन्ही गट समोरा समोर रांग बांधून उभे ठाकले तेव्हा अल्लाहतआलाने यांच्या उलट दोघांना एक दुसऱ्याच्या दृष्टीत कमी करून दाखविले. कारण की, कोण्याही गटाने युद्धात कोताही करू नये. परंतु प्रत्येकाने पुढे सरसावण्याचा प्रयत्न करावा (इब्ने कसीर) हा खुलासा सू. अन्फाल आ.४४ मध्ये वर्णन करण्यात आला आहे. ही बदरच्या युद्धाची घटना आहे जी हिजरत नंतर दोन वर्षांनी, मुसलमान आणि काफिरांदरम्यान झाली हे कित्येक दृष्टीने फारच महत्त्वाचे युद्ध होते. एकतर यासाठी की हे पहिलेच युद्ध होते. दुसरे हे युद्ध लष्करी नियोजनाशिवाय झाले. मुसलमान अबुसुफयानच्या काफल्यासाठी निघाले होते.जो शामहून व्यापारी माल घेऊन मक्केकडे येत होता. परंतु सूचना मिळून गेल्यामुळे ते आपला काफला तर वाचवून घेऊन गेले, परंतु मक्केचे काफिर आपली शक्ती आणि अधिकाऱ्याच्या घमेंडीत मुसलमानांवर अक्रमित झाले. आणि बदरच्या मुक्कामी हा पहिला युद्धाचा प्रसंग आला. तिसरे असे की, यात मुसलमानांना अल्लाहतआलाची खास मदत प्राप्त झाली. चौथे यांच्यात काफिरांचा धडा घेण्यासारखा पराभव झाला. ज्यामुळे आगामी काळांत त्यांची (काफिरांची) हिंमत खचली.

زُيِّنَ لِلنَّاسِ حُبُّ الشَّهَوٰتِ مِنَ النِّسَآءِ وَالْبَنِيْنَ وَالْقَنَاطِيْرِ الْمُقَنْطَرَةِ مِنَ الذَّهَبِ وَالْفِضَّةِ وَالْخَيْلِ الْمُسَوَّمَةِ وَالْاَنْعَامِ وَالْحَرْثِ ؕ ذٰلِكَ مَتَاعُ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۚ وَاللّٰهُ عِنْدَهٗ حُسْنُ الْمَاٰبِ ﴿١٤﴾

**आवडत्या गोष्टीचे प्रेम,लोकांसाठी सुशोभित करून देण्यात आले आहे. जसे स्त्रिया आणि मुलगे, आणि सोने आणि चांदीचे जमा केलेले खजीने आणि अत्युत्तम (निवडक) घोडे आणि गुरे ढोरे, आणि शेतीवाडी[१] ही ऐहीक आयुष्याची साधने आहेत. आणि परतीचे चांगले ठिकाण तर अल्लाहजवळच आहे (१४)**

قُلْ اَؤُنَبِّئُكُمْ بِخَيْرٍ مِّنْ ذٰلِكُمْ ؕ لِلَّذِيْنَ اتَّقَوْا عِنْدَ رَبِّهِمْ جَنّٰتٌ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا وَاَزْوَاجٌ مُّطَهَّرَةٌ وَّرِضْوَانٌ مِّنَ اللّٰهِ ؕ وَاللّٰهُ بَصِيْرٌۢ بِالْعِبَادِ ﴿١٥﴾

**आपण सांगून द्या की, काय मी यापेक्षा उत्कृष्ट वस्तू (तुम्हास) दाखवू? अल्लाहतआलाला भिऊन वागणाऱ्यांसाठी त्यांच्या पालकर्त्यापाशी स्वर्गाच्या बागा आहेत. ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात असतील.ज्यांत ते सदासर्वदा राहतील[२]. तेथे त्यांच्यासाठी चोख्या पत्न्या[३] आणि अल्लाहतआलाची प्रसन्नता आहे. आणि सर्व सेवक अल्लाहतआलाच्या नजरे समोर आहेत (१५)**

१) 'शहवात' ने येथे अभिप्रेत 'मुश्तहियात' आहेत. म्हणजे त्या गोष्टी ज्या नैसर्गिकरित्या माणसाला आवडत्या आणि पसंतीच्या आहेत. म्हणून यांच्यामध्ये आवड आणि त्यांचे प्रेम नापसंत नाही. या अटींवर की मध्यम मार्गावर आणि धर्मशास्त्रा (शरीअत) च्या मर्यादेत असावे; त्यांचे शोभायमान होणे, अल्लाहकडून कसोटी घेण्यासाठी आहे. ''आम्ही जमिनीवर जे काही आहे, त्याला जमिनीची शोभा बनविले आहे. कारण की, आम्ही लोकांची परीक्षा घ्यावी.'' (सू. अल्कहफ आ. ७) सर्वप्रथम स्त्रीचा उल्लेख केला आहे. कारण की, ही प्रत्येक वयात आलेल्या पुरूषाची सर्वात मोठी आवश्यकता आहे. आणि सर्वात आवडतीपण. स्वत: नबी ﷺ चे फरमान आहे. ''स्त्री आणि सुगंध माझ्या प्रिय वस्तू आहेत. (मुसनद अहमद) त्याचप्रमाणे नबी ﷺ नी पुण्यवान स्त्रीला ''जगाची सर्वात उत्कृष्ट संपत्ती'' ठरविले आहे. यासाठी तिचे प्रेम शरीअतच्या मर्यादे बाहेर न जावे; तर ही उत्कृष्ट जीवनसाथीपण आहे. नाही तर हीच स्त्री पुरूषासाठी मोठी फितना (आजमाईश) आहे. फरमाने रसूल ﷺ आहे, ''माझ्यानंतर जे झगडे फसाद जाहीर होतील, यात पुरूषांसाठी सर्वात मोठी आजमाईश स्त्रियांच आहेत. (सहीह बुखारी) याचप्रमाणे पुत्रांचे प्रेम आहे, जर याचा उद्देश मुसलमानांच्या शक्तीसामर्थ्यात वाढ, कायम राहण्यांत आणि वंशवृद्धी आहे; तर प्रशंसनीय आहे. नाही तर अत्यंत निंदनीय. नबी ﷺ चा फरमान आहे. ''खूप प्रेम करणाऱ्या आणि खूप मुलांना जन्म देणाऱ्या स्त्रीशी लग्न करा'' यासाठी की कयामतच्या दिवशी दुसऱ्या उम्मतींच्या तुलनेत माझ्या उम्मतीच्या बाहुल्यावर (कसरत) मी अभिमान बाळगावा.'' या महावाक्याने सन्यास आणि कुटुंबनियोजन रद्द होत आहेत. धन संपत्तीचा उद्देशपण रोजीचे होणे, नातेवाईकांशी चांगली वागणून,दानधर्म आणि तिला चांगल्या कामी खर्च करणे. आणि याचना करण्यापासून वाचणे आहे; यासाठी की अल्लाहची प्रसन्नता प्राप्त व्हावी. तर (या धनसंपत्तीचे) याचे प्रेमपण वांछणीय (मतलूब) आहे, नाही तर अत्यंत निंदनीय. घोडे बाळगण्याचा उद्देश जिहादची तयारी, दुसऱ्या जनावरांकडून शेतीवाडी आणि ओझे वाहण्याचे काम घेणे आणि जमिनीपासून तिचे उत्पन्न मिळविणे आहे तर ही कामे सर्व फार चांगली आहेत. आणि जर उद्देश फक्त ऐहिक फायदे मिळविणे मग त्यावर अभिमान व गर्वाचे प्रदर्शन करणे, आणि अल्लाहच्या स्मरणाकडून बेपर्वा होऊन चैन व विलासांत जीवन घालविणे आहे. तर या सर्व फायदा देणाऱ्या वस्तू जिवाचा फांस सिद्ध होतील. कनातीर,किनतारचे बहुवचन आहे. खजीने अभिप्रेत आहे, खजिने म्हणजे सोने चांदी व धन व संपत्तीचे बाहुल्य आणि भरमार 'अल्मुसव्वमा' ते घोडे जे कुरणात चरण्यासाठी सोडून दिले असावेत किंवा जिहादसाठी तयार केले गेले असावेत वा निशाण केलेले किंवा ज्यांच्यावर ओळख पटविण्यासाठी काही निशाणी किंवा क्रमांक टाकून दिला जावा (फत्हुल कदीर व इब्ने कसीर)

२) या महावाक्यात ईमानवाल्यांना सांगण्यात येत आहे की, या उल्लेखित ऐहिक वस्तूत स्वत:ला घालवून बसू नका; किंबहुना यांच्यापेक्षा चांगले ते जीवन आहे. आणि त्याच्या देणग्या आहेत, जे (तुमच्या) पालनकर्त्यापाशी आहे. ज्याचे हकदार अल्लाहला भिणारे होतील. म्हणून तुम्ही ईशभयाचा (तकव्याचा) अंगीकार करा. जर हे तुमच्यात निर्माण झाले तर तुम्ही खचितच् इहलोक व परलोकाची भलाई आपल्या पदरात पाडून घ्याल.

३) निर्मळ चोख्या म्हणजे तो ऐहीक मळ,घाण, मासिक पाळी प्रसुती नंतरचा स्त्राव आणि दुसऱ्या घाणीपासून पाक साफ असतील आणि स्वच्छ चारित्र्याच्या (पतीव्रत) असतील. यांच्यापुढील दोन महावाक्यांत ईमानवाल्यांच्या वैशिष्ट्यांची चर्चा आहे.

الَّذِينَ يَقُولُونَ رَبَّنَا إِنَّنَا آمَنَّا فَاغْفِرْ لَنَا ذُنُوبَنَا وَقِنَا عَذَابَ النَّارِ ﴿١٦﴾

जे म्हणतात की हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही ईमान आणले म्हणून आमच्या अपराधांची क्षमा कर; आणि आम्हाला अग्नीच्या शिक्षेपासून वाचव (१६)

الصَّابِرِينَ وَالصَّادِقِينَ وَالْقَانِتِينَ وَالْمُنْفِقِينَ وَالْمُسْتَغْفِرِينَ بِالْأَسْحَارِ ﴿١٧﴾

जे सहनशील, आणि सत्य बोलणारे (अल्लाहचे) आज्ञापालन करणारे आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करणारे आणि उत्तर रात्रीत क्षमा याचना करणारे आहेत (१७)

شَهِدَ اللَّهُ أَنَّهُ لَا إِلَٰهَ إِلَّا هُوَ وَالْمَلَائِكَةُ وَأُولُو الْعِلْمِ قَائِمًا بِالْقِسْطِ ۚ لَا إِلَٰهَ إِلَّا هُوَ الْعَزِيزُ الْحَكِيمُ ﴿١٨﴾

अल्लाहतआला, देवदूत आणि ज्ञानी लोक या गोष्टीची साक्ष देतात की, अल्लाहशिवाय कोणी उपास्य नाही[१] तो न्यायाला कायम करणारा आहे. त्या सामर्थ्यवान आणि बुद्धीवान (अल्लाह) शिवाय कोणी उपासनेच्या लायक नाही (१८)

إِنَّ الدِّينَ عِنْدَ اللَّهِ الْإِسْلَامُ ۗ وَمَا اخْتَلَفَ الَّذِينَ أُوتُوا الْكِتَابَ إِلَّا مِنْ بَعْدِ مَا جَاءَهُمُ الْعِلْمُ بَغْيًا بَيْنَهُمْ ۗ وَمَنْ يَكْفُرْ بِآيَاتِ اللَّهِ فَإِنَّ اللَّهَ سَرِيعُ الْحِسَابِ ﴿١٩﴾

नि:संशय अल्लाहतआला जवळ धर्म इस्लामच आहे[२]. आणि ग्रंथधारी लोकांनी त्यांच्यावर ज्ञान आल्यानंतर आपसातील हट्टाने व द्वेषाने त्यांत मतभेद केला[३] आहे आणि अल्लाहतआलाच्या निशाण्यांना जो पण नाकारील[४]; अल्लाहतआला त्याचा जलद हिशेब घेणारा आहे (१९)

فَإِنْ حَاجُّوكَ فَقُلْ أَسْلَمْتُ وَجْهِيَ لِلَّهِ وَمَنِ اتَّبَعَنِ ۗ وَقُلْ لِلَّذِينَ أُوتُوا الْكِتَابَ وَالْأُمِّيِّينَ أَأَسْلَمْتُمْ ۚ فَإِنْ أَسْلَمُوا فَقَدِ اهْتَدَوْا ۖ وَإِنْ تَوَلَّوْا فَإِنَّمَا عَلَيْكَ الْبَلَاغُ ۗ وَاللَّهُ بَصِيرٌ بِالْعِبَادِ ﴿٢٠﴾

तरी सुद्धा हे आपल्याशी झगडतील तर आपण सांगून टाका की, मी आणि माझ्या अनुयायांनी अल्लाहतआलाच्या आज्ञापालनात आपले मुख आधिन केले आहे. आणि ग्रंथधारी लोकांना आणि अशिक्षित[५] लोकांना सांगून टाका की, काय तुम्ही सुद्धा आज्ञापालन करता? मग जर हे आज्ञाधारक झाले तर खचितच् हिदायतवाले आहेत. आणि जर त्यांनी तोंड फिरवले तर, आपणांवर फक्त पोहचवून देणे आहे. आणि अल्लाह (आपल्या) सेवकांना खूप (चांगल्याप्रकारे) पाहत आहे (२०)

إِنَّ الَّذِينَ يَكْفُرُونَ بِآيَاتِ اللَّهِ وَيَقْتُلُونَ النَّبِيِّينَ بِغَيْرِ حَقٍّ وَيَقْتُلُونَ الَّذِينَ يَأْمُرُونَ بِالْقِسْطِ مِنَ النَّاسِ فَبَشِّرْهُمْ بِعَذَابٍ أَلِيمٍ ﴿٢١﴾

जे लोक अल्लाहतआलाच्या निशाण्यांना नाकारतात; आणि नाहक पैगंबरांना ठार करतात; आणि जे लोक न्याय्य न्याय गोष्टी करतात, त्यांनापण ठार करतात[६], तर हे पैगंबरा! त्यांना यातनादायक शिक्षेची खबर देऊन टाका (२१)

أُولَٰئِكَ الَّذِينَ حَبِطَتْ أَعْمَالُهُمْ فِي الدُّنْيَا وَالْآخِرَةِ وَمَا لَهُمْ مِنْ نَاصِرِينَ ﴿٢٢﴾

त्यांची कर्मे इहलोकांत व परलोकांत व्यर्थ आहेत; आणि त्यांचा कोणी मदतगार नाही (२२)

أَلَمْ تَرَ إِلَى الَّذِينَ أُوتُوا نَصِيبًا مِنَ الْكِتَابِ يُدْعَوْنَ إِلَىٰ كِتَابِ اللَّهِ لِيَحْكُمَ بَيْنَهُمْ ثُمَّ يَتَوَلَّىٰ فَرِيقٌ مِنْهُمْ وَهُمْ مُعْرِضُونَ ﴿٢٣﴾

काय आपण त्यांना पाहिले नाही; ज्यांना पुस्तकाचा एक भाग देण्यात आला आहे, ते आपल्या आपसातील निर्णयासाठी अल्लाहतआलाच्या पुस्तकाकडे बोलाविले जातात. तरी सुद्धा त्यांच्यातील एक गट तोंड फिरवून निघून जातो[७] (२३)

१) 'शहादत' चा अर्थ वर्णन करण्याचे आणि जाहीर करण्याचे आहे, म्हणजे अल्लाहतआलाने जे काही निर्माण केले, आणि वर्णन केले, याच्यामार्फत त्याने आपल्या एक होण्यावर (वहदानियत) आम्हाला मार्गदर्शन केले (फत्हुल कदीर) देवदूत आणि ज्ञानी लोकपण, त्याच्या तौहिद (ऐकेश्वरवादा) ची साक्ष देतात. यात ज्ञानी लोकांचे मोठे फजिलत, श्रेष्ठत्व आहे की, अल्लाहने आपल्या व देवदूतांच्या नावासोबत यांचा उल्लेख केला. तथापि यांत फक्त ते ज्ञानीलोक अभिप्रेत आहेत जे किताब व सुन्नत (म्हणजे कुरआन व हदीस) च्या ज्ञानाने ओतप्रोत होतात. (फत्हुल कदीर)

२) इस्लाम तोच धर्म आहे, ज्याचे आवाहन आणि शिक्षण प्रत्येक पैगंबर आपआपल्या काळी देत राहिले आहेत. त्याचे संपूर्ण रूप ते आहे, जे नबी आखरूज्जमाँ हजरत मोहम्मद ﷺ नी जगासमोर प्रस्तुत केले. ज्यात एकेश्वरवाद व पैगंबरी

आणि परलोकांवर, याप्रमाणे विश्वास आणि भरोसा ठेवावयाचा आहे, ज्याप्रमाणे नबी करीम ﷺ नी दाखविले आहे. आता केवळ अशी श्रद्धा ठेवावयाची की, अल्लाह एक आहे. काही चांगले कर्म करून घ्यावयाचे, हा इस्लाम नाही आणि याच्यापासून शेवटची मुक्तीपण मिळणार नाही. ईमान व इस्लाम आणि धर्म हा आहे की, अल्लाहला एक मानले जावे आणि फक्त याच एका उपास्याची उपासना केली जावी. मोहम्मद रसूल ﷺ सह सर्व पैगंबरांवर ईमान आणले जावे आणि आपल्या ﷺ व्यक्तित्त्वावर पैगंबरीचा शेवट मान्य करण्यात यावा आणि ईमानाच्या बरोबर त्या श्रद्धा आणि कर्मे अंगिकारली जावी; जी कुरआन करीममध्ये किंवा हदीसे रसूल ﷺ मध्ये वर्णन करण्यात आली आहेत. आता या इस्लाम धर्माशिवाय दुसरा कोणताही धर्म अल्लाहजवळ कबूल केला जाणार नाही. ''जो मनुष्य इस्लामच्या शिवाय दुसरा धर्म शोधेल, त्याचा धर्म कबूल केला जाणार नाही आणि तो परलोकांत घाटा (नुकसान) उचलणारा होईन'' (सू. आले इमरान ८५) आपली ﷺ ची पैगंबरी संपूर्ण; मानवांसाठी आहे. ''आपण सांगून द्या की, अहो लोकांनो! तुम्हा सर्वांकडे मी अल्लाहचा पैगंबर आहे.'' (सू. आअराफ १५८) 'बरकतवाले आहे ते व्यक्तीत्त्व, ज्याने आपल्या सेवकांवर फुरकान (कुरआन) अवतीर्ण केले; कारण की त्याने जगांना भिवविणारा व्हावे'' (सू. फुरकान-१) आणि हदीसमध्ये आहे आपण ﷺ नी सांगितले ''शपथ त्या व्यक्तीत्वाची जिच्या हातांत माझा प्राण आहे. जो यहूदी किंवा खिस्ती, माझ्यावर ईमान आणल्याशिवाय मरण पावला तो नरकात जाणारा आहे.'' (सही मुस्लीम) आणखी पुढे सांगितले,''मी काळे आणि गोरे (सर्व मानवजाती) कडे पैगंबर बनवून पाठविण्यात आलो आहे.'' यासाठी आपण ﷺ नी आपल्या काळातल्या सर्व राजे महाराजांना पत्रे लिहिलीत; ज्यात त्यांना इस्लाम कबूल करण्याचे आवाहन केले (सही ऐन इब्ने कसीरच्या हवाल्याने)

३) यांच्या आपसातल्या मतभेदांनी ते मतभेद अभिप्रेत आहेत जे एकाच धर्माला मानणाऱ्यांनी आपसात कायम करून ठेवले होते. उदाहरणार्थ यहूद्यांचे आपसातील मतभेद आणि वेगवेगळे गट (फिरकाबंदी) त्याचप्रमाणे खिस्तीमधले आपसातील मतभेद आणि वेगवेगळे गट मग ते मतभेद पण अभिप्रेत आहेत, जे ग्रंथधारी लोकांत आपसात होते आणि ज्यामुळे, यहूदी खिस्त्यांना आणि खिस्ती यहूद्यांना म्हणत असत, ''तुम्ही कोणत्याही गोष्टीवर नाहीत.'' मोहम्मद ﷺ ची पैगंबरी व ईसा عليه السلام च्या पैगंबरीबाबतचा मतभेदपण याच सदरात मोडतो. वास्तविक हे सर्व मतभेद पुराव्यावर आधारित नव्हते केवळ द्वेष आणि इर्ष्या आणि वंश श्रेष्ठत्वावरच्या कारणाने होते. म्हणजे ते लोक सत्याला जाणून आणि ओळखून सुद्धा केवळ आपल्या काल्पनिक आणि ऐहिक फायद्याच्या प्राप्तीसाठी चूकीच्या गोष्टीवर अडून बसत. आणि याला हाच धर्म आहे असे भासवित. कारण की त्यांची प्रतिष्ठापण अबाधित रहावी;आणि त्यांची सामाजिक प्रतिष्ठापण कायम रहावी. खेद आहे, आज मुसलमान उल्मांची (धर्मपंडित) एक मोठी संख्या, याच चुकीच्या उद्देशाने नेमक्या त्याच चुकीच्या पायवाटेने चालत आहे. अल्लाहतआला त्यांना व अम्हाला हिदायत दे. (आमिन)

४) येथे महावाक्याने ती महावाक्ये अभिप्रेत आहेत जी इस्लाम हा अल्लाहकडून धर्म होण्याबाबत पाठपुरावा करतात.

५) अशिक्षित लोकांनी अभिप्रेत अरबचे मुशरिक आहेत. जे ग्रंथधारी लोकांच्या तुलनेत अधिकतर अशिक्षित होते.

६) म्हणजे त्यांची शिरजोरी आणि बंड इतक्या थराला पोहचले होते की, त्यांनी फक्त पैगंबरांनाच विनाकारण ठार केले नाही तर, त्यांना सुद्धा ठार केले, जे न्याय करण्यासंबंधी बोलत होते. म्हणजे जे सच्चे, ईमानदार आणि सत्याचे आवाहन करणारे, जे भलाईचा हुकूम करण्याच्या आणि वाईट गोष्टीपासून मना करण्याच्या कर्तव्याची अंमलबजावणी करीत होते. पैगंबरांबरोबर त्यांचा उल्लेख करून अल्लाहतआलाने त्यांचे मोठेपण व श्रेष्ठत्व पण स्पष्ट करून दिले.

७) या ग्रंथधारी लोकांनी अभिप्रेत मदीनेचे ते यहूदी आहेत. ज्यांचे बहुतेक लोक इस्लाम कबूल करण्यापासून वंचित राहिलेत. ते इस्लाम, मुसलमान आणि नबी ﷺ च्या विरूद्ध चाली चालण्यात आणि कट कारस्थाने करण्यात व्यस्त राहिले येथ पावेतो की, त्यांची दोन घराणी हद्दपार करण्यात आली व एका घराण्याला ठार करण्यात आले.

ذٰلِكَ بِاَنَّهُمْ قَالُوْا لَنْ تَمَسَّنَا النَّارُ اِلَّآ اَيَّامًا مَّعْدُوْدٰتٍ ۪ وَّغَرَّهُمْ فِيْ دِيْنِهِمْ مَّا كَانُوْا يَفْتَرُوْنَ ﴿٢٤﴾

याचे कारण, यांचे हे म्हणणे आहे की, आम्हाला अगदी मोजके काही दिवस अग्नी जाळेल; त्यांच्या घडवलेल्या गोष्टींनी त्यांना त्यांच्या धर्माच्या बाबतीत धोक्यात टाकून ठेवले आहे[१] २४

فَكَيْفَ اِذَا جَمَعْنٰهُمْ لِيَوْمٍ لَّا رَيْبَ فِيْهِ ۣ وَوُفِّيَتْ كُلُّ نَفْسٍ مَّا كَسَبَتْ وَهُمْ لَا يُظْلَمُوْنَ ﴿٢٥﴾

मग त्यांची तेव्हा काय स्थिती होईल? जेव्हा आम्ही त्यांना त्यादिवशी जमा करू, ज्याच्या येण्यात कुठलीही शंका नाही. आणि प्रत्येक माणसाला त्याने जे काही केले आहे; त्याचा पुरा पुरा मोबदला दिला जाईल. आणि त्यांच्यावर अन्याय केला जाणार नाही[२] २५

قُلِ اللّٰهُمَّ مٰلِكَ الْمُلْكِ تُؤْتِي الْمُلْكَ مَنْ تَشَاۗءُ وَتَنْزِعُ الْمُلْكَ مِمَّنْ تَشَاۗءُ ۡ وَتُعِزُّ مَنْ تَشَاۗءُ وَتُذِلُّ مَنْ تَشَاۗءُ ۭ بِيَدِكَ الْخَيْرُ ۭ اِنَّكَ عَلٰي كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿٢٦﴾

आपण सांगून टाका, हे माझ्या अल्लाह हे साऱ्या जगाच्या धन्या! तू ज्याला इच्छिल त्याला राज्य देशील; आणि ज्याच्याकडून इच्छिल त्याच्याकडून राज्य काढून घेशील; आणि ज्याला इच्छिल त्याला इज्जत देशील; आणि ज्याला इच्छिल त्याला नमवशील. तुझ्याच हातात हरप्रकारचे हित व कल्याण आहे[३]. नि:संशय तू सर्व सामर्थ्यवान आहेस २६

تُوْلِجُ الَّيْلَ فِي النَّهَارِ وَتُوْلِجُ النَّهَارَ فِي الَّيْلِ ۡ وَتُخْرِجُ الْحَيَّ مِنَ الْمَيِّتِ وَتُخْرِجُ الْمَيِّتَ مِنَ الْحَيِّ ۡ وَتَرْزُقُ مَنْ تَشَاۗءُ بِغَيْرِ حِسَابٍ ﴿٢٧﴾

तूच रात्रीला दिवसांत दाखल करतो आणि दिवसाला रात्रीत घेवून जातो[४]. तूच निर्जीवातून सजीव निर्माण करतो आणि तूच सजीवातून निर्जिव निर्माण करतो[५]. तूच आहेस की ज्याला इच्छिल त्याला बेसुमार रोजी देतो २७

१) अल्लाहच्या पुस्तकाला मानण्यापासून पळ काढणे आणि त्यावर आक्षेप घेण्याचे कारण त्यांची ही श्रद्धा चूकीची आहे की, प्रथम तर ते नरकाग्नीत जाणारच नाहीत; आणि जर गेले तर फक्त काही थोड्या दिवसांसाठीच जातील. आणि याच त्यांच्या मनाने घडविलेल्या गोष्टींनी त्यांना धोक्यांत टाकून ठेवले आहे.

२) कयामतच्या दिवशी त्यांचे हे दावे आणि चुकीच्या श्रद्धा काही कामा येणार नाही. आणि अल्लाहतआला निस्पृह न्यायाने प्रत्येक जिवाला त्याचा पुरा पुरा मोबदला देईन. कोणावरही जुलूम होणार नाही.

३) या महावाक्यात अल्लाहतआलाच्या अमर्याद सामर्थ्य आणि शक्तीचे प्रकटन आहे. राजाला फकीर बनवून देईन. फकीराला राजा बनवून देईन. सर्व अधिकारांचा स्वामी तोच आहे. म्हणजे सर्व भल्या गोष्टी फक्त तुझ्याच हातात आहे. तुझ्याशिवाय कोणी भले करणारा नाही. वाईटाचा निर्माता जरी अल्लाहतआलाच आहे. परंतु येथे उल्लेख फक्त खैर (भल्या गोष्टी) चा केला गेला आहे. 'शर' (वाईट गोष्टी) चा नाही यासाठी की 'खैर' अल्लाहची निव्वळ कृपा आहे. याउलट 'शर' हा माणसाच्या आपल्या कर्माचा बदला आहे; जो याला मिळतो.

४) रात्रीला दिवसांत आणि दिवसाला रात्रीत दाखल करण्याचा अर्थ ऋतुमानात होणारा फेरबदल आहे. रात्र मोठी होते तेव्हा दिवस लहान होऊन जातो. आणि दुसऱ्या ऋतुत याच्या उलट दिवस मोठा आणि रात्र लहान होऊन जाते. म्हणजे कधी रात्रीचा काही भाग दिवसात आणि कधी दिवसाचा काही भाग रात्रीत दाखल करून देतो. ज्यामुळे रात्र आणि दिवस लहान किंवा मोठे होऊन जातात.

५) जसे वीर्य प्रथम जिवंत माणसापासून निघते; मग त्या विर्यापासून माणूस. याचप्रमाणे अंड्यापासून पहिले कोंबडी आणि मग जिवंत कोंबडीपासून अंडे किंवा काफिरपासून मोमिन आणि मोमिनपासून काफिर निर्माण करतो. काही उल्लेखांत आहे की, ह.मआज ؓ नी नबी ﷺ जवळ (आपल्यावर) कर्ज असल्याची तक्रार केली तेव्हा आपण ﷺ नी सांगितले तुम्ही आयात 'कुल्लील्ला हुम्मा मालिकुल मुल्क' म्हणून दुआ करा. 'रहमानुद दुनिया वलआखिरते व रहिमहुमा,तुअ्ती मन्तशाऊ,मिनहुमा व तमनऊ मन्तशाऊ, इरहमनी रहमतन तुगनीनी बिहा अन् रहमते मन सिवाक. अल्लाहुम्मा अगनिनी,मिनल फकरी वकजी अन्निदहैन.'' एका दुसऱ्या रिवायतीत आहे की, ही अशी दुआ आहे की, तुमच्यावर ऊहद पर्वताएवढे कर्ज जरी असेल, तर अल्लाहतआला त्याच्या फेडीची तुमच्यासाठी व्यवस्था करून देईल.

لَا يَتَّخِذِ الْمُؤْمِنُونَ الْكٰفِرِيْنَ اَوْلِيَآءَ مِنْ دُوْنِ الْمُؤْمِنِيْنَ ۚ وَمَنْ يَّفْعَلْ ذٰلِكَ فَلَيْسَ مِنَ اللّٰهِ فِيْ شَيْءٍ اِلَّآ اَنْ تَتَّقُوْا مِنْهُمْ تُقٰىةً ۭ وَيُحَذِّرُكُمُ اللّٰهُ نَفْسَهٗ ۭ وَاِلَى اللّٰهِ الْمَصِيْرُ ﴿٢٨﴾

मोमिनांना पाहिजे की त्यांनी ईमानवाल्यांना सोडून काफिरांना आपले मित्र बनवू नये[१]. आणि जो असे करीन तो अल्लाहतआलाच्या (कुठल्याही) संरक्षणात नाही. परंतु असे की, त्यांच्या वाईटपणापासून कुठल्याही प्रकारे वाचण्याचा उद्देश असावा[२]. आणि अल्लाहतआला स्वत: तुम्हास आपल्याकडून भिववत आहे. आणि अल्लाहतआलाकडेच परतून जाणे आहे (२८)

قُلْ اِنْ تُخْفُوْا مَا فِيْ صُدُوْرِكُمْ اَوْ تُبْدُوْهُ يَعْلَمْهُ اللّٰهُ ۭ وَيَعْلَمُ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ۭ وَاللّٰهُ عَلٰي كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿٢٩﴾

आपण सांगून टाका की तुम्ही आपल्या मनातील गोष्टी लपवा किंवा जाहीर करा, अल्लाहतआला सर्व (काही) जाणतो. आकाशांत आणि पृथ्वीत जे काही आहे, सर्व त्याला ठाऊक आहे, आणि अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे (२९)

يَوْمَ تَجِدُ كُلُّ نَفْسٍ مَّا عَمِلَتْ مِنْ خَيْرٍ مُّحْضَرًا ۚ وَّمَا عَمِلَتْ مِنْ سُوْۗءٍ ۚ تَوَدُّ لَوْ اَنَّ بَيْنَهَا وَبَيْنَهٗٓ اَمَدًۢا بَعِيْدًا ۭ وَيُحَذِّرُكُمُ اللّٰهُ نَفْسَهٗ ۭ وَاللّٰهُ رَءُوْفٌۢ بِالْعِبَادِ ﴿٣٠﴾

ज्या दिवशी प्रत्येक जीव (माणूस) आपल्या केलेल्या पुण्याला,आणि केलेल्या वाईट कृत्यांना (आपल्या समोर) उपस्थित पावेल; अशी इच्छा करेन की, अरेरे! त्यांच्यात आणि (त्याने केलेल्या) वाईट कृत्यात फारच लांब अंतर असते, अल्लाहतआला तुम्हास आपल्याकडून भिवविती. आणि अल्लाहतआला आपल्या सेवकांवर अतोनात करूणाही ठेवतो (३०)

قُلْ اِنْ كُنْتُمْ تُحِبُّوْنَ اللّٰهَ فَاتَّبِعُوْنِيْ يُحْبِبْكُمُ اللّٰهُ وَيَغْفِرْ لَكُمْ ذُنُوْبَكُمْ ۭ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٣١﴾

आपण सांगून टाका की,जर तुम्ही अल्लाहतआलाशी प्रेम करतात. तर माझे आज्ञापालन करा.[३] स्वत: अल्लाहतआला तुमच्याशी प्रेम करेन आणि तुमच्या अपराधांना क्षमा करीन[४]; आणि अल्लाह क्षमाशील आणि दयाळू आहे (३१)

قُلْ اَطِيْعُوا اللّٰهَ وَالرَّسُوْلَ ۚ فَاِنْ تَوَلَّوْا فَاِنَّ اللّٰهَ لَا يُحِبُّ الْكٰفِرِيْنَ ﴿٣٢﴾

(आपण) सांगून टाका की, अल्लाहतआला आणि पैगंबराचे आज्ञापालन करा, जर हे तोंड फिरवतील तर नि:संशय अल्लाहतआला काफिरांशी प्रेम करत नसतो[५] (३२)

اِنَّ اللّٰهَ اصْطَفٰٓي اٰدَمَ وَنُوْحًا وَّاٰلَ اِبْرٰهِيْمَ وَاٰلَ عِمْرٰنَ عَلَي الْعٰلَمِيْنَ ﴿٣٣﴾

नि:संशय अल्लाहतआलाने साऱ्या जगातील लोकांमधून आदम आणि नूहला आणि इब्राहीमच्या घराण्याला, आणि इमरानच्या घराण्याला निवडून[६] घेतले (३३)

ذُرِّيَّةًۢ بَعْضُهَا مِنْۢ بَعْضٍ ۭ وَاللّٰهُ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿٣٤﴾

की, हे सर्व आपसांत एक दुसऱ्यांच्या वंशातून आहेत?[७]. आणि अल्लाहतआला ऐकणारा आणि जाणणारा आहे (३४)

اِذْ قَالَتِ امْرَاَتُ عِمْرٰنَ رَبِّ اِنِّىْ نَذَرْتُ لَكَ مَا فِيْ بَطْنِىْ مُحَرَّرًا فَتَقَبَّلْ مِنِّىْ ۚ اِنَّكَ اَنْتَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٣٥﴾

आणि जेव्हा इमरानच्या पत्नीने म्हटले की हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या पोटात (गर्भाशयात) जे काही आहे. त्याला मी तुझ्या नावावर मुक्त करण्याचा[८] नवस मानला तर तू माझ्याकडून याला कबूल कर; खचितच् तू खूप ऐकणारा व चांगल्या प्रकारे जाणणारा आहेस (३५)

१) अवलिया वलीचे अनेकवचन आहे. वली अशा मित्राला म्हणतात, ज्याच्याशी आंतरिक प्रेम आणि विशेष संबंध असावा. अल्लाहतआलाने आपल्या स्वत:ला ईमानवाल्यांचा मित्र म्हणवून घेतले आहे. ''अल्लाह ईमानवाल्यांचा मित्र (वली) आहे.'' (सू. बकर: २५७) म्हणजे यांना एक दुसऱ्यांशी प्रेम आणि विशेष संबंध आहे. आणि ईमानवाले आपसांत एक दुसऱ्यांचे मित्र आहेत. अल्लाहतआलाने येथे ईमानवाल्यांना या गोष्टीपासून सक्तीने म्हटले की त्यांनी काफिरांना आपला मित्र बनवू नये. कारण काफिर अल्लाहचे पण दुश्मन आहेत आणि ईमानवाल्यांचे पण दुश्मन आहेत. मग त्यांना मित्र बनविण्यात काय औचित्य आहे? याचसाठी अल्लाहतआलाने या विषयाला कुरआन करीममध्ये ,कित्येक ठिकाणी खुलाशांसह वर्णन केलेले आहे, यासाठी की ईमानवाल्यांनी काफिरांशी दोस्ती आणि त्यांच्याशी विशेष संबंध प्रस्तापित करण्यापासून स्वत:ला वाचवावे. तथापि आवश्यकतेनुसार आणि मागणीनुसार (इकतजा) त्याच्याशी तह आणि करार पण केला जाऊ शकतो; आणि व्यापारिक देवाणघेवाण सुद्धा. त्याचप्रमाणे जे

काफिर मुसलमानांचे शत्रू असणार नाही, त्यांच्याशी चांगली वागणूक व अनुनय (मदारात) करणे पण योग्य आहे. (ज्याचा तपशिल सू मुम्तहना मध्ये आहे) कारण हे सर्व व्यवहार आणि मामले मैत्री आणि प्रेमापासून वेगळे आहेत.

२) ही परवानगी त्या मुसलमानांसाठी आहे; जे कोण्या काफिर राज्यांत रहात असतील की त्यांच्यासाठी कधी मैत्रीचे प्रकटन केल्याशिवाय त्यांच्या उपद्रवापासून वाचणे शक्य नसेल तर ते जिभेने जाहीररित्या आपसांतील मैत्री जाहीर करू शकतात.

३) यहूदी आणि खिस्ती दोघांचा दावा होता की, आम्हाला अल्लाहशी व अल्लाहला आमच्याशी प्रेम आहे. विशेषत: खिस्ती ह. ईसा عليه السلام व ह.मर्यम عليها السلام च्या सन्मानार्थ व प्रेमांत इतके जास्त पुढे गेले की, त्यांना उपास्याच्या दर्जापर्यंत पोहचवून दिले. याबाबत पण त्यांची कल्पना होती की, आम्ही अशाप्रकारे अल्लाहच्या जवळीक आणि त्याची प्रसन्नता व प्रेमाचे इच्छुक आहोत. अल्लाहतआलाने म्हटले यांचे दावे आणि स्वत:च शोधून काढलेल्या पद्धतीने अल्लाहचे प्रेम आणि त्याची प्रसन्नता प्राप्त होऊ शकत नाही. याची तर फक्त एकच पद्धत आहे की, माझे शेवटचे पैगंबरांवर ईमान आणा. त्यांचे आज्ञापालन करा. या महावाक्यांचे तमाम प्रेमाचे दावे करण्यासाठी एक कसोटी आणि माप निश्चित करून दिले आहे की, अल्लाहच्या प्रेमाचा इच्छुक जर मोहम्मद ﷺ च्या आज्ञापालनाच्या मार्गानेच उद्देश प्राप्त करू इच्छितो तर मग खचितच् तो यशस्वी आहे. आणि आपल्या दाव्यांत खरा आहे. नाही तर तो खोटारडा पण आहे. आणि या उद्देशाला प्राप्त करण्यात अयशस्वी पण राहील. नबी ﷺ चे फरमान आहे, ''ज्याने असे काम केले ज्यावर आमचा मामला नाही म्हणजे आम्ही दाखवून दिलेल्या पद्धतीपेक्षा वेगळे आहे, तर ते रद्द केले गेलेले आहे.'' (स.बुखारी, स. मुस्लिम)

४) म्हणजे रसूल ﷺ च्या आज्ञापालनामुळे तुमचे अपराधच माफ होणार नाहीत. तर तुम्ही प्रेम करणाऱ्या ऐवजी स्वत:च प्रिय बनून जाल. आणि हे किती उंच स्थान आहे की, अल्लाहच्या दरबारात एका माणसाला प्रीतीचे ठिकाण मिळून जावे.

५) या महावाक्यात,अल्लाहच्या आज्ञापालनाच्या बरोबरच रसूल ﷺ च्या आज्ञापालनाची पुन्हा ताकीद करून हे स्पष्ट करून दिले की, जर मुक्ती असेल तर फक्त मोहंमद ﷺ च्या आज्ञापालनात आहे. आणि यापासून तोंड फिरविणे कुफ्र आहे. आणि अशा काफिरांना अल्लाहतआला पसंत करीत नाही. मग ते अल्लाहच्या प्रेमाचे आणि जवळीकेचे कितीही प्रबळ दावेदार असोत. या महावाक्यात, हदीसला नाकारणारे आणि रसूल ﷺ च्या आज्ञापालनापासून पळ काढणाऱ्या, दोघांसाठी कडक शिक्षा देण्याची धमकी (वईद) आहे; कारण की, दोन्ही सुद्धा आपआपल्या अंदाजाने अशी चाल अंगिकार करतात की, ज्याला या ठिकाणी कुफ्र करण्याच्या अर्थात (ताबीर) घेण्यात आले आहे. (अल्लाहतआला आम्हाला यापासून वाचवो. आमीन)

६) पैगंबर عليه السلام च्या घराण्यात दोन इमरान होऊन गेलेत. एक ह. मूसा عليه السلام व ह.हारून عليه السلام चे वडील आणि दुसरे मर्यम عليها السلام चे वडील. या महावाक्यांत, बहुसंख्य भाष्यकारांमुळे दुसरे इमरान अभिप्रेत आहेत. आणि या घराण्याला हे प्रतिष्ठीत स्थान, ह.मर्यम आणि त्यांचे पूत्र ह. ईसा عليه السلام मुळे प्राप्त झाले आणि ह.मर्यम عليها السلام च्या आईचे नांव भाष्यकारांनी हन्ना बिन्ते फाकुज लिहीले आहे. (तफसीर कुरतुबी व इब्ने कसीर) या महावाक्यांत, अल्लाहतबारकवतआलाने, आले इमरान शिवाय आणखी तीन घराण्याची चर्चा केली आहे. ज्यांना अल्लाहतआलाने आपआपल्या काळी सर्व जगांत श्रेष्ठत्व दिले. यांच्यात प्रथम आदम عليه السلام आहे. ज्यांना अल्लाहने आपल्या हाताने बनविले, आणि त्यांच्यात आपल्याकडून आत्मा फुंकला. त्यांना देवदूतांकडून सज्दा करविला. सर्व वस्तूंचे ज्ञान त्यांना अर्पण केले आणि त्यांना स्वर्गात राहण्याचे ठिकाण दिले, जेथून त्यांना मग पृथ्वीवर पाठवून देण्यात आले. ज्याच्यात अल्लाहतआलाच्या बऱ्याच प्रयुक्त्या होत्या. दुसरे ह.नूह عليه السلام आहेत. त्यांना त्यावेळी पैगंबर बनवून पाठविण्यात आले, जेव्हा लोकांनी अल्लाहला सोडून मूर्तींना आपले उपास्य बनविले, त्यांना दिर्घ आयुष्य देण्यात आले. त्यांनी आपल्या समाजाला साडे नऊशे वर्षे प्रचारीत (तबलिग) केले, परंतु थोड्या जणांशिवाय कोणीही आपल्यावर ईमान आणले नाही. शेवटी आपल्या बद्दुआने, ईमानवाल्यांशिवाय सर्व लोकांना बुडवून टाकण्यात आले. इब्राहीम عليه السلام च्या संततीला हे श्रेष्ठत्व देण्यात आले की, त्यांच्यात पैगंबर आणि राजांचा क्रम चालू ठेवला आणि बहुतेक पैगंबर आपल्याच (ह.इब्राहीम عليه السلام) वंशातून झालेत. येथपावेतो की, या विश्वात सर्वांत उत्तम ह. मोहम्मद रसूल ﷺ पण, ह.इब्राहीम عليه السلام चे पुत्र ह.इस्माईल عليه السلام च्या वंशातून झालेत.

७) किंवा दुसरा अर्थ आहे, धर्मात एक दुसऱ्याचे हिमायती व मददगार.

८) ''मुहर्ररन'' (तुझ्या नावाने मुक्त) चा अर्थ आहे, तुझ्या प्रार्थनास्थळाच्या सेवेसाठी खास सोडलेला (वक्फ).

فَلَمَّا وَضَعَتۡهَا قَالَتۡ رَبِّ اِنِّیۡ وَضَعۡتُهَاۤ اُنۡثٰىؕ وَاللّٰهُ اَعۡلَمُ بِمَا وَضَعَتۡؕ وَلَيۡسَ الذَّكَرُ كَالۡاُنۡثٰىۚ وَاِنِّیۡ سَمَّيۡتُهَا مَرۡيَمَ وَاِنِّیۡۤ اُعِيۡذُهَا بِكَ وَذُرِّيَّتَهَا مِنَ الشَّيۡطٰنِ الرَّجِيۡمِ۝٣٦

**जेव्हा मुलगी जन्माला आली,तेव्हा म्हणू लागली (हे माझ्या) पालनकर्त्या! मला तर मुलगी[१] झाली. अल्लाहतआलाला खूप (चांगल्याप्रकारे) ठाऊक आहे की, काय संतती झाली आहे.आणि मुलगा,मुलगी सारखा नसतो[२]; मी तिचे नांव मर्यम ठेविले आहे[३]. आणि तिला व तिच्या संततीला मी धुत्कारलेल्या शैतानापासून तुझ्या आश्रयांत देते[४]** ३६

فَتَقَبَّلَهَا رَبُّهَا بِقَبُوۡلٍ حَسَنٍ وَّاَنۡۢبَتَهَا نَبَاتًا حَسَنًا ۙ وَّكَفَّلَهَا زَكَرِيَّا ؕ كُلَّمَا دَخَلَ عَلَيۡهَا زَكَرِيَّا الۡمِحۡرَابَ ۙ وَجَدَ عِنۡدَهَا رِزۡقًا ۚ قَالَ يٰمَرۡيَمُ اَنّٰى لَكِ هٰذَا ؕ قَالَتۡ هُوَ مِنۡ عِنۡدِ اللّٰهِ ؕ اِنَّ اللّٰهَ يَرۡزُقُ مَنۡ يَّشَآءُ بِغَيۡرِ حِسَابٍ۝٣٧

**मग तिला तिच्या पालनकर्त्यांने फार चांगल्याप्रकारे कबूल केले आणि तिला उत्कृष्ठ पालनपोषण दिले आणि तिची देखभाल करण्यासाठी जकरियाला नेमले[५]. जेव्हा कधी जकरिया त्यांच्या खोलीत जात, त्यांच्याजवळ खाण्याच्या वस्तू, ठेवलेल्या पावत[६]. ते विचारत की,अगं मर्यम! या खाण्याच्या वस्तू तुमच्याजवळ कोठून येतात? त्या उत्तर देत की,या अल्लाहतआलाकडून आहेत; नि:संशय अल्लाह ज्याला इच्छितो त्याला भरपूर रोजी देतो** ३७

१) म्हणजे मला असे वाटत होते की, मुलगा होईल, यासाठी याला तुझ्यासाठी सोडण्याची (वक्फ) नियत केली होती.

२) या महावाक्यात खेदाचे प्रदर्शनपण आहे, आणि कारण सांगणेपण आहे. खेद अशासाठी की,माझ्या आशेच्या विरुद्ध मुलगी झाली आहे. सबब (कारण) यासाठी की, नवस मानण्याचा उद्देश तुझ्या प्रसन्नतेसाठी एक सेवक तुला द्यावयाचा (वक्फ) होता. आणि हे काम एक पुरूषच जास्त चांगल्याप्रकारे करू शकत होता. आता जे काही आहे तू त्याला जाणतच आहे. (फत्हुल कदीर)

३) हाफिज इब्ने कसीर ने याच्याने व अहादीसे नबवी ﷺ चा आधार घेत लिहिले आहे की, मुलाचे नाव जन्माच्या पहिल्या दिवशी ठेवावयास पाहिजे; आणि सातव्या दिवशी नाव ठेवण्याच्या हदीसला 'जईफ' ठरविले आहे.परंतु हाफीज इब्ने कय्यीमने, सर्व हदीशींवर चर्चा करून शेवटी लिहिले आहे की, पहिल्या दिवशी,तिसऱ्या दिवशी किंवा सातव्या दिवशी नांव ठेवले जाऊ शकते. या मसल्यात (अशा प्रकारे नाव ठेवण्यास) वाव आहे. (तोहफतुल मौदूद)

४) अल्लाहतआलाने ही प्रार्थना मंजुर केली. किंबहुना सही हदीसमध्ये आहे की, जेही मूल जन्माला येते शैतान त्याला स्पर्श करतो. ज्याने ते मूल ओरडते. परंतु अल्लाहतआलाने या शैतानाच्या स्पर्शापासून ह.मर्यम आणि त्यांचे पुत्र (ईसा.عليه السلام) ला सुरक्षित ठेवले आहे. (सहीह बुखारी ,स. मुस्लीम)

५) ह.जकरिया عليه السلام ह. मर्यम عليها السلام चे मावसे पण होते. पण या शिवाय आपल्या काळातील पैगंबर होण्याच्या कारणाने पण तेच सगळ्यात उत्कृष्ठ जबाबदार (कफील) होऊ शकत होते. जे मर्यम عليها السلام वैयक्तिक आवश्यकता आणि शिक्षण व चारित्र्य संवर्धनाच्या मागण्यांना योग्य प्रकारे पूर्ण करू शकत होते.

६) मेहराब ने अभिप्रेत ती खोली आहे, ज्यात ह.मर्यम عليها السلام रहात असत. रिज्कने अभिप्रेत फलफळादी आहेत. ही फळे गैरमोसमी होती. उन्हाळ्यातली फळे हिवाळ्यात आणि हिवाळ्यातील फळे उन्हाळ्यात. त्यांच्या खोलीत असत. दुसरे ह.जकरिया عليه السلام किंवा दुसरा कोणी माणूस आणून देणारा नव्हता. म्हणून ह,जकरिया عليه السلام नी आश्चर्य चकीत होऊन विचारले की ही कोठून आली? त्यांनी सांगितले, अल्लाहकडून. हा जणू मर्यम عليها السلام चा.चमत्कार (करामत) होता. मोअजेजा किंवा करामत सवय किंवा निसर्ग नियमांच्या विरूद्ध कामांना म्हटले जाते. म्हणजे जे जाहीर आणि नेहमीच्या घटनेच्या विरूद्ध असावे. हे कोण्या पैगंबराकडून घडले तर मोअजेजा आणि कोण्या वलीकडून (अल्लाहचा दोस्त) घडले तर 'करामत' म्हटले जाते. हे दोन्ही सत्य (बरहक) आहेत. तथापि यांचे प्रकटन अल्लाहच्या हुकूमाने व त्याच्या इच्छेने होत असते. पैगंबर आणि वलीच्या अधिकारांत ही गोष्ट नाही; की मोअजेजा आणि करामत त्यांनी केव्हाही सादर करावी. यासाठी मोअजेजा आणि करामत या गोष्टीचा पुरावा असतो की ही व्यक्ती अल्लाहच्या दरबारी खास वजन असलेली आहे; परंतु याच्याने ही गोष्ट (अमर) सिद्ध होत नाही की, अल्लाहच्या दरबारी वजन असलेल्या या व्यक्ती जवळ विश्वात काहींचे काही करून टाकण्याचा (तसर्रूफ) अधिकार आहे; जसे की, अहले बिदअत अवलियांच्या करामतींनी जनतेला असे काही सांगून त्यांना शिर्कच्या श्रद्धेत टाकून देतात. याचे आणखी स्पष्टीकरण काही 'मोएजेजात' अंतर्गत पुढे येईल.

هُنَالِكَ دَعَا زَكَرِيَّا رَبَّهُ ۚ قَالَ رَبِّ هَبْ لِي مِن
لَّدُنكَ ذُرِّيَّةً طَيِّبَةً ۚ إِنَّكَ سَمِيعُ الدُّعَاءِ ۝٣٨

**याच ठिकाणी जकरिया (अ.) नी आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना केली; म्हटले, हे माझ्या पालनकर्त्या! मला आपल्याकडून पवित्र संतती दे. नि:संशय तू दुआचा ऐकणारा आहेस (३८)**

فَنَادَتْهُ الْمَلَائِكَةُ وَهُوَ قَائِمٌ يُصَلِّي فِي الْمِحْرَابِ
أَنَّ اللَّهَ يُبَشِّرُكَ بِيَحْيَىٰ مُصَدِّقًا بِكَلِمَةٍ مِّنَ
اللَّهِ وَسَيِّدًا وَحَصُورًا وَنَبِيًّا مِّنَ الصَّالِحِينَ ۝٣٩

**लगेच देवदूतांनी त्याला साद घातली; जेव्हा ते खोलीत उभे राहून नमाज पढत होते; की, अल्लाहतआला तुला याहयाची खात्रीपूर्वक खुषखबर देत आहे[1]. अल्लाहतआलाच्या कलम्याला सत्य साबित करणारा आणि [2], सरदार, आणि इच्छा व आकांक्षांपासून स्वत:ला आवरून ठेवणारा आणि पैगंबर आहे सदाचरणी लोकांमधून (३९)**

قَالَ رَبِّ أَنَّىٰ يَكُونُ لِي غُلَامٌ وَقَدْ بَلَغَنِيَ الْكِبَرُ
وَامْرَأَتِي عَاقِرٌ ۖ قَالَ كَذَٰلِكَ اللَّهُ يَفْعَلُ مَا يَشَاءُ ۝٤٠

**म्हणू लागले, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्याकडे मूल कसे होईल? मी फारच म्हातारा झालेलो आहे; आणि माझी पत्नी वांझ आहे. म्हटले अशाचप्रकारे अल्लाहतआला जे इच्छितो ते करत असतो (४०)**

قَالَ رَبِّ اجْعَل لِّي آيَةً ۖ قَالَ آيَتُكَ أَلَّا تُكَلِّمَ النَّاسَ
ثَلَاثَةَ أَيَّامٍ إِلَّا رَمْزًا ۗ وَاذْكُر رَّبَّكَ كَثِيرًا وَ
سَبِّحْ بِالْعَشِيِّ وَالْإِبْكَارِ ۝٤١

**म्हणू लागले, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्यासाठी कुणी निशाणी निश्चित करून दे; सांगितले की, निशाणी ही आहे की, तीन दिवसापर्यंत तू लोकांशी बोलू शकणार नाहीस. फक्त इशाऱ्याने समजावशील. तू आपल्या पालनकर्त्याचे स्मरण खूप कर आणि सकाळ संध्याकाळ त्याची पवित्रता वर्णन[3] करीत रहा (४१)**

وَإِذْ قَالَتِ الْمَلَائِكَةُ يَا مَرْيَمُ إِنَّ اللَّهَ اصْطَفَاكِ وَطَهَّرَكِ
وَاصْطَفَاكِ عَلَىٰ نِسَاءِ الْعَالَمِينَ ۝٤٢

**आणि जेव्हा देवदूतांनी म्हटले की हे मर्यम! अल्लाहतआलाने तुला निवडून घेतले, आणि तुला पवित्र केले आणि साऱ्या जगातील स्त्रियांमधून तुझी निवड केली[4] (४२)**

१) गैरमोसमी फळे पाहून ह.जकरिया عليه السلام च्या मनांत सुद्धा (म्हातारपण आणि पत्नीचे वांझ होणे असून सुद्धा) ही आकांक्षा निर्माण झाली की, अल्लाहतआलाने त्यांनापण अशाप्रकारे संतती देऊन उपकृत करावे. म्हणून आपोआपच दुआसाठी अल्लाहच्या दारी हात उचलले गेले; ज्याला अल्लाहतआलाने कबूल केले.

२) अल्लाहच्या कलम्यांची (साबित) मान्यतेने अभिप्रेत ह. ईसा عليه السلام ला मान्यता आहे. म्हणजे ह.यह्या عليه السلام ह.ईसा عليه السلام पेक्षा मोठे होते. दोन्ही आपसात मावसभाऊ होते. दोघांनी एक दुसऱ्यांचे समर्थन केले. 'सैयदन'' चा अर्थ आहे, सरदार, 'हसुरन' चा अर्थ आहे, गुन्ह्याकडून पाक म्हणजे गुन्ह्याच्या जवळही फटकत नाही. जणू यांना यापासून रोकून देण्यात आले आहे.

३) उतार वयात चमत्काराच्या रूपाने संततीची खुषखबर ऐकून आवडीत (इशतयाक) वाढ झाली. आणि याची निशाणी माहित करून घ्यावीशी वाटली. अल्लाहतआलाने म्हटले की, ३ दिवसांकरीता तुझी वाचा बंद होऊन जाईल. जी आमच्या कडून निशाणी म्हणून असेन. परंतु या मौनामध्ये सकाळ सायंकाळ अल्लाहतआलाची भरपूर पवित्रता वर्णन करत रहा की, या अल्लाहच्या देणगीने जे तुला मिळणार आहे, आभार व्यक्त केले जावेत. हा जणू धडा दिला गेला की, अल्लाहतआला तुमचे इच्छेनुसार, आणखी देणग्या देईल, तर याचप्रमाणे त्याचे आभार मानणेही जास्तीत जास्त व्हावे.

४) हजरत मर्यम عليها السلام ची प्रतिष्ठा आणि श्रेष्ठत्व त्यांच्या आपल्या काळानुसार आहे; कारण की, सही हदीशीप्रमाणे ह. मर्यम عليها السلام च्या बरोबर ह.खदिजा رضي الله عنها ला सुद्धा सर्व स्त्रियात उत्तम दाखविण्यात आले आहे. आणि काही हदीशीमध्ये चार स्त्रियांना परिपूर्ण (कामील) ठरविण्यात आले आहे. ह.मर्यम,ह.आसिया (फिरऔनची पत्नी), ह. खदीजा رضي الله عنها आणि ह.आयेशा رضي الله عنها. ह.आयेशा رضي الله عنها च्या बाबतीत म्हटले आहे की,यांचे श्रेष्ठत्व दुसऱ्या सर्व स्त्रियांवर असे आहे, जसे 'सरीद' ला सर्व प्रकारच्या भोजनावर वरचढत्व आहे. (इब्ने कसीर) आणि तिर्मिझीच्या एका उल्लेखात ह.फातेमा رضي الله عنها बिन्ते मोहम्मद ﷺ लापण श्रेष्ठत्व दिलेल्या स्त्रियांमध्ये सामील करण्यात आले आहे. (इब्ने कसीर) याचा हा अर्थ पण होऊ शकतो की, वर उल्लेख केलेल्या सर्व स्त्रिया त्या थोड्या स्त्रियांमधून आहेत. ज्यांना अल्लाहतआलाने दुसऱ्या स्त्रियांवर श्रेष्ठत्व आणि मोठेपण दिलेले आहे. वल्लाहु आलम्.

يٰمَرْيَمُ اقْنُتِىْ لِرَبِّكِ وَاسْجُدِىْ وَارْكَعِىْ مَعَ الرّٰكِعِيْنَ ﴿٤٣﴾

हे मर्यम! तू आपल्या पालनकर्त्याचे आज्ञापालन कर. सजदा कर व रुकूअ करण्यांबरोबर रुकूअ कर ४३

ذٰلِكَ مِنْ اَنْۢبَآءِ الْغَيْبِ نُوْحِيْهِ اِلَيْكَ ؕ وَمَا كُنْتَ لَدَيْهِمْ اِذْ يُلْقُوْنَ اَقْلَامَهُمْ اَيُّهُمْ يَكْفُلُ مَرْيَمَ ۪ وَمَا كُنْتَ لَدَيْهِمْ اِذْ يَخْتَصِمُوْنَ ﴿٤٤﴾

हे अदृष्टाच्या बातम्यामधून आहे. ज्याला आम्ही तुझ्याकडे वह्याने पोहचवित आहोत; तू त्यांच्याजवळ नव्हतास, जेव्हा की ते आपल्या लेखण्या टाकत होते की, मर्यमला यांच्यापैकी कोण पाळेल? आणि तू त्यांच्या भांडणाच्या वेळी त्यांच्या जवळ नव्हता[१] ४४

اِذْ قَالَتِ الْمَلٰٓئِكَةُ يٰمَرْيَمُ اِنَّ اللّٰهَ يُبَشِّرُكِ بِكَلِمَةٍ مِّنْهُ ۖ اسْمُهُ الْمَسِيْحُ عِيْسَى ابْنُ مَرْيَمَ وَجِيْهًا فِى الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ وَمِنَ الْمُقَرَّبِيْنَ ﴿٤٥﴾

जेव्हा देवदूतांनी म्हटले हे मर्यम! अल्लाहतआला तुला आपल्या कलम्याची[२] खुषखबरी देत आहे. ज्याचे नांव मसीह ईसा इब्न[३] मर्यम आहे. जो इहलोकात आणि परलोकात प्रतिष्ठीत होईल आणि तो माझ्या जवळ केलेल्या (सेवकां) पैकी आहे ४५

وَيُكَلِّمُ النَّاسَ فِى الْمَهْدِ وَكَهْلًا وَّمِنَ الصّٰلِحِيْنَ ﴿٤٦﴾

तो लोकांशी आपल्या पाळण्यात पण गोष्टी करीन, आणि मोठ्या वयात ही[४] आणि तो सदाचरणी लोकांपैकी होईल ४६

قَالَتْ رَبِّ اَنّٰى يَكُوْنُ لِىْ وَلَدٌ وَّلَمْ يَمْسَسْنِىْ بَشَرٌ ؕ قَالَ كَذٰلِكِ اللّٰهُ يَخْلُقُ مَا يَشَآءُ ؕ اِذَا قَضٰٓى اَمْرًا فَاِنَّمَا يَقُوْلُ لَهٗ كُنْ فَيَكُوْنُ ﴿٤٧﴾

ती म्हणू लागली हे माझ्या पालनकर्त्या! मला मुलगा कसा होईल? वास्तविक मला तर कुण्या पुरूषाने स्पर्शही केलेला नाही. देवदूताने म्हटले,अशाच प्रकारे अल्लाहतआला जे इच्छितो ते निर्माण करतो. जेव्हा कधी तो कुण्या कामाचा करण्याचा इरादा करतो, फक्त हे सांगून देतो की होऊन जा! तर ते होऊन जाते[५] ४७

وَيُعَلِّمُهُ الْكِتٰبَ وَالْحِكْمَةَ وَالتَّوْرٰىةَ وَالْاِنْجِيْلَ ﴿٤٨﴾

अल्लाहतआला त्याला लिहिणे[६] आणि ज्ञान आणि तौरात व इंजील शिकवील ४८

وَرَسُوْلًا اِلٰى بَنِىْٓ اِسْرَآءِيْلَ ۙ اَنِّىْ قَدْ جِئْتُكُمْ بِاٰيَةٍ مِّنْ رَّبِّكُمْ ۙ اَنِّىْٓ اَخْلُقُ لَكُمْ مِّنَ الطِّيْنِ كَهَيْـَٔةِ الطَّيْرِ فَاَنْفُخُ فِيْهِ فَيَكُوْنُ طَيْرًا ۢ بِاِذْنِ اللّٰهِ ۚ وَاُبْرِئُ الْاَكْمَهَ وَالْاَبْرَصَ وَاُحْىِ الْمَوْتٰى بِاِذْنِ اللّٰهِ ۚ وَاُنَبِّئُكُمْ بِمَا تَاْكُلُوْنَ وَمَا تَدَّخِرُوْنَ ۙ فِىْ بُيُوْتِكُمْ ؕ اِنَّ فِىْ ذٰلِكَ لَاٰيَةً لَّكُمْ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿٤٩﴾

आणि तो बनी इस्राईलकडे पैगंबर असेन की मी तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याच्या निशाण्या घेऊन आलो आहे. मी तुमच्यासाठी पक्ष्याच्या आकारासारखा मातीचा पक्षी बनवितो[७]; मग त्यात फुंकर मारतो, तर तो अल्लाहतआलाच्या हुकूमाने पक्षी बनून जातो आणि मी अल्लाहतआलाच्या हुकूमाने जन्मजात आंधळ्याला आणि कोड्याला चांगला करून देतो. आणि मृताला जिवंत करून देतो[८]. आणि जे काय तुम्ही खाल आणि जे आपल्या घरात साठवून ठेवाल (ते) मी तुम्हास सांगून टाकतो. यांत तुमच्यासाठी मोठी निशाणी आहे; जर तुम्ही ईमानदार असाल ४९

१) आजकालच्या अहले बिद्अतने नबी करीम ﷺ च्या प्रतिष्ठेमध्ये मर्यादेत बाहेरच्या श्रद्धेचे प्रदर्शन करीत त्यांना अल्लाहतआलाप्रमाणे 'अदृष्टांचा ज्ञाता' आणि प्रत्येक ठिकाणी उपस्थित होण्याची श्रद्धा,घडवून ठेवली आहे. या महावाक्याने या दोन्ही श्रद्धेचे अगदी स्पष्टरित्या खंडन होते. जर आपण ﷺ 'अदृष्टाचे ज्ञाते' असते, तर अल्लाहतआलाने असे म्हटले नसते की, ''आम्ही अदृष्टाच्या बातम्या तुम्हास देत आहोत'' कारण ज्याला पहिलेच ठाऊक असेल, त्याला अशाप्रकारे सांगण्यात येत नाही. आणि अशाचप्रकारे उपस्थित असलेल्याला असे सांगण्यात येत नाही की, आपण त्यावेळी तेथे उपस्थित नव्हता,जेव्हा लोक कुरआ अन्दाजी (पुष्कळशा लोकांतून एका व्यक्तींचे नाव काढण्याची पद्धत) साठी आपल्या लेखण्या टाकीत होते. कुराअ अंदाजीची आवश्यकता यासाठी आली की. ह.मर्यमच्या पालन पोषण करण्यासाठी आणखीही बरेच जण इच्छुक होते. ''जालेका मिन अंबाईला गैबी नुहीही इलैका'' ने नबी करीम ﷺ च्या पैगंबरीचा आणि सत्यतेचा पुरावा पण आहे. ज्यांत यहूदी आणि खिस्ती शंका घेत असत. कारण वह्य पैगंबरावरच येत असते, पैगंबराशिवाय इतरांवर येत नाही.

२) ह. ईसा عليه السلام ला शब्द (कलमा) म्हणजे अल्लाहचा कलमा अशा दृष्टीने म्हटले आहे की, त्यांचा जन्म चमत्काराचे

विलोभनीय प्रदर्शन आणि सर्व साधारण मानवाच्या तत्त्वाविरुद्ध बापाशिवाय अल्लाहच्या खास सामर्थ्याने त्याच्या कलमा कुन (होऊन जा आणि ते होऊन जाते) ची निर्मिती आहे.

३) मसिह, मसह पासून आहे. म्हणजे जमिनीवर भरपूर प्रवास करणारा किंवा याचा अर्थ हात फिरवणारा असा आहे, कारण की, आपण (ह. ईसा عليه السلام) हात फिरवून आजाऱ्यांना अल्लाहच्या हुकूमाने तंदुरूस्त करीत असत. आणि कयामतच्या जवळपास जाहीर होणाऱ्या 'दज्जाल' ला जे 'मसीह' म्हणण्यांत येते, ते एकतर एका अर्थाने की, त्याचा एक डोळा चकणा (तिरळा) असेल च्या अनुषंगाने आहे; किंवा तो सुद्धा जगांत भरपूर फिरेन आणि मक्का मदीना शिवाय, प्रत्येक जागी पोहचेल आणि काही रिवायतीत तो बैतुल मुकद्दसमध्ये पोहचू शकणार नाही यासाठी त्याला सुद्धा 'मसिहु द् दज्जाल' म्हणण्यात येते. ( स. बुखारी व स. मुस्लिम) सर्व साधारण भाष्यकारांनी सरासरीने; हीच गोष्ट नमूद केली आहे. काही आणखी छानबीन करणारे म्हणतात की, मसीह ची खुषखबर देण्यात आली आहे.आणि ज्याने ते आजपण चुकीने (त्याची) प्रतीक्षा करतात. 'दज्जाल' याच 'मसीह' च्या नांवाने येईल. म्हणजे स्वत:ला तोच 'मसीह' ठरवेन परंतु तो आपल्या या दाव्यासह सर्व दाव्यांत इतका मोठा धोकेबाज असेल की, पुढच्या आणि मागच्या लोकांत तसे दुसरे उदाहरण नसेल. यासाठी तो 'दज्जाल' म्हणविला जाईल.

४) ह. ईसा عليه السلام चे पाळण्यात बातचित करण्याचा उल्लेख, खुद्द कुरआन करीम मध्ये सू.मर्यम मध्ये आहे. याशिवाय सहीह हदीस मध्ये दोन मुलांचे आणखी वर्णन आहे. एक साहेबे जुरैज आणि बनी इस्राईलच्या एका स्त्रीचे मूल (सहीह बुखारी) या रिवायतीत ज्या तीन मुलांचा उल्लेख आहे, त्या सर्वांचा संबंध बनुइस्राईलशी आहे. कारण की, यांच्या व्यतिरिक्त सहीह मुस्लिममध्ये ''असहाबुल उखदूद'' च्या कथनातही दुधपित्या बाळाच्या बोलण्याचा उल्लेख आहे. आणि ह. यूसुफ عليه السلام च्या बाबतीत फैसला करणारे साक्षीदाराच्या विषयी प्रसिध्द आहे की, ते मूल होते, हे सत्य नाही. 'कहल' (वार्धक्य) मध्ये बातचित करण्याचा अर्थ काहींनी हा सांगितला आहे की,जेव्हा ते मोठे होऊन वहय आणि पैगंबरी देण्यात येतील आणि काहींनी सांगितले की आपले (ह. ईसा عليه السلام चे) कयामतच्या जवळपास जेव्हा आकाशातून अवतरण होईल, जसा की अहले सुन्नतचा अकिदा (श्रद्धा) आहे. जो सहीह आणि एका मागूण एक हदीर्शीनी सिद्ध आहे; तर त्यावेळी ते इस्लामचा प्रचार करतील. ते संभाषण अभिप्रेत आहे. (तफसीर इब्ने कसीर व कुरतुबी)

५) तुझे आश्चर्यचकीत होणे योग्य आहे, परंतु अल्लाहच्या सामर्थ्यासाठी ही काही मोठी कठीण गोष्ट नाही. तो जेव्हा इच्छिल तो सवयी आणि जाहिरी साधनांचा क्रम संपवून टाकून हुकमे कुन (होऊन जा) ने क्षणार्धात जे इच्छेल ते करून टाकेन.

६) किताबने अभिप्रेत लिहिणे आहे. जसे भाषांतरात अंगिकारले गेले आहे. किंवा इंजिल व तौरात शिवाय कोणी आणखी पुस्तक आहे, ज्याचे ज्ञान,अल्लाहतआलाने त्यांना दिले (कुरतुबी)

७)म्हणजे 'खलक येथे जन्माच्या अर्थाने नाही' (कुरतुबी) यावर तर फक्त अल्लाहतआलाच सामर्थ्यवान (कादिर) आहे; कारण की तोच निर्माता (खालिक) आहे. येथे याचा अर्थ बाह्य चेहरा आणि रूप घडविण्याचा आणि बनविण्याचा आहे.

८) दोन वेळा 'अल्लाहच्या हुकूमाने' म्हणण्याचा उद्देश हाच आहे की, कोणी माणूस या चुकीच्या जाणिवेत न पडावा की, मी ईश्वरीय वैशिष्टे किंवा (ईश्वरीय) अधिकाराने संपन्न आहे; नाही, मी तर त्याचा नम्र सेवक आहे आणि पैगंबरच आहे. हे जे काही माझ्या हाताने जाहीर होत आहे, चमत्कार आहे, जो केवळ अल्लाहच्या हुकूमाने सादर होत आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात की, ''अल्लाहतआलाने प्रत्येक पैगंबराला त्याच्या काळातील स्थितीप्रमाणे चमत्कार दिले. कारण की त्याची सत्यता आणि वर्चस्व स्पष्ट जाहीर होऊ शकावे.'' ह.मूसा عليه السلام च्या काळात जादूगिरीचा फार जोर होता. त्यांना असा चमत्कार दिला गेला ज्यांच्यासमोर मोठमोठे जादूगार आपले कर्तृत्व दाखविण्यात अयशस्वी राहिले. ज्यामुळे त्यांच्यावर ह.मूसा عليه السلام ची सत्यता स्पष्ट झाली. आणि त्यांनी ईमान आणले. ह. ईसा عليه السلام च्या जमान्यात वैद्यगिरीचे फारच प्राबल्य होते. म्हणून त्यांना मृताला जिवंत करून देणे,जन्मजात आंधळ्याला आणि कोड्याला चांगले करून देण्याचा चमत्कार देण्यात आला जो कोणी पण मोठ्यांत मोठा वैद्य आपल्या वैद्यकीय कलेने त्यांना चांगले करू शकत नव्हता. आमचे पैगंबर नबी ﷺ च्या काळात काव्य आणि साहित्य, चांगले वक्तव्य,प्रसंगानुरूप संभाषण यांचा जोर होता. म्हणून त्यांना कुरआन सारख्या मधूर पुरेपुर संपूर्ण आणि चमत्कृतीपूर्ण कलाम देण्यात आला. त्या सारखा कलाम सादर करण्याला साऱ्या जगातील उत्कृष्ट वक्ते, संभाषणचतुर, साहित्यीक आणि कवी असमर्थ राहिले. आणि आवाहन असताना सुद्धा आजपर्यंत असमर्थ आहेत. आणि कयामतपर्यंत असमर्थ राहतील (इब्ने कसीर)

وَ مُصَدِّقًا لِّمَا بَيْنَ يَدَيَّ مِنَ التَّوْرٰىةِ وَ لِاُحِلَّ
لَكُمْ بَعْضَ الَّذِيْ حُرِّمَ عَلَيْكُمْ وَ جِئْتُكُمْ بِاٰيَةٍ مِّنْ
رَّبِّكُمْ ۫ فَاتَّقُوا اللّٰهَ وَ اَطِيْعُوْنِ ﴿٥٠﴾

आणि मी तौरातला सत्य प्रमाणित करणारा आहे, जे माझ्यासमोर आहे आणि मी यासाठी आलो आहे की, तुमच्यावर काही त्या वस्तू हलाल करून देईन ज्या तुमच्यावर हराम करून टाकण्यात आल्या आहेत[१]. आणि मी तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याची निशाणी घेऊन आलो आहे. यासाठी तुम्ही अल्लाहला भ्या, आणि माझे आज्ञापालन करा (५०)

اِنَّ اللّٰهَ رَبِّيْ وَ رَبُّكُمْ فَاعْبُدُوْهُ ؕ هٰذَا صِرَاطٌ
مُّسْتَقِيْمٌ ﴿٥١﴾

खचितच् जाणा की माझा आणि तुमचा पालनकर्ता अल्लाहच आहे. तुम्ही सर्व त्याचीच उपासना करा, हाच सरळमार्ग आहे[२]. (५१)

فَلَمَّآ اَحَسَّ عِيْسٰى مِنْهُمُ الْكُفْرَ قَالَ مَنْ اَنْصَارِيْٓ
اِلَى اللّٰهِ ؕ قَالَ الْحَوَارِيُّوْنَ نَحْنُ اَنْصَارُ اللّٰهِ ۚ اٰمَنَّا بِاللّٰهِ ۚ
وَ اشْهَدْ بِاَنَّا مُسْلِمُوْنَ ﴿٥٢﴾

परंतु जेव्हा ह. ईसा (अ.) ने त्यांचे नाकारणे (कुफ्र) जाणून घेतले[३] तेव्हा म्हणू लागले की, अल्लाहच्या मार्गात माझी मदत करणारा कोण कोण आहे[४]? हवारींनी[५] उत्तर दिले की, आम्ही अल्लाहतआलाच्या मार्गाचे मददगार आहोत. आम्ही अल्लाहतआलावर ईमान आणले; आणि आपण साक्षीदार रहा की, आम्ही आज्ञाधारक आहोत (५२)

رَبَّنَآ اٰمَنَّا بِمَآ اَنْزَلْتَ وَ اتَّبَعْنَا الرَّسُوْلَ فَاكْتُبْنَا
مَعَ الشّٰهِدِيْنَ ﴿٥٣﴾

हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही तुझ्या उतारलेल्या ‘वहय’ वर ईमान आणले आणि आम्ही तुझ्या पैगंबराची आज्ञा मान्य केली,तू आम्हाला (आपल्या) साक्षीदारामध्ये लिहून घे (५३)

وَ مَكَرُوْا وَ مَكَرَ اللّٰهُ ؕ وَ اللّٰهُ خَيْرُ الْمٰكِرِيْنَ ﴿٥٤﴾ الثلثة ٥ ع ١٣ ١٣

५ ३३ १३ आणि काफिरांनी डाव केला आणि अल्लाहने (त्यांच्याशी) डाव केला; आणि डाव करण्यात अल्लाहतआला सर्वात उत्तम आहे[६]. (५४)

اِذْ قَالَ اللّٰهُ يٰعِيْسٰٓى اِنِّيْ مُتَوَفِّيْكَ وَ رَافِعُكَ اِلَيَّ
وَ مُطَهِّرُكَ مِنَ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَ جَاعِلُ الَّذِيْنَ
اتَّبَعُوْكَ فَوْقَ الَّذِيْنَ كَفَرُوْٓا اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ ۚ
ثُمَّ اِلَيَّ مَرْجِعُكُمْ فَاَحْكُمُ بَيْنَكُمْ فِيْمَا كُنْتُمْ
فِيْهِ تَخْتَلِفُوْنَ ﴿٥٥﴾

जेव्हा अल्लाहतआलाने म्हटले की, हे ईसा! मी तुला पूर्ण घेणार आहे[७] आणि तुला आपल्याकडे उचलून घेणार आहे. आणि तुला काफिरांकडून पवित्र करणार[८] आहे आणि तुझ्या आज्ञाधारकांना कयामतच्या दिवसापर्यंत नाकारणाऱ्यांवर वरचढ राखणार आहे[९]. मग तुम्हा सर्वांना तर माझ्याचकडे परतून येणे आहे, मीच तुमच्या आपसांतील सर्व मतभेदांचा निर्णय करीन (५५)

فَاَمَّا الَّذِيْنَ كَفَرُوْا فَاُعَذِّبُهُمْ عَذَابًا شَدِيْدًا فِي
الدُّنْيَا وَ الْاٰخِرَةِ ٘ وَ مَا لَهُمْ مِّنْ نّٰصِرِيْنَ ﴿٥٦﴾

मग मी नाकारणाऱ्यांना या जगात आणि परलोकांत कडक शिक्षा करीन आणि त्यांचा कोणी मददगार असणार नाही (५६)

وَ اَمَّا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَ عَمِلُوا الصّٰلِحٰتِ فَيُوَفِّيْهِمْ اُجُوْرَهُمْ ؕ
وَ اللّٰهُ لَا يُحِبُّ الظّٰلِمِيْنَ ﴿٥٧﴾

परंतु ईमानवाल्यांना आणि सदाचरणी लोकांना अल्लाहतआला पूर्ण पूर्ण प्रतिफल (सवाब) देईन आणि अल्लाहतआला जालिमांशी प्रेम करीत नसतो (५७)

ذٰلِكَ نَتْلُوْهُ عَلَيْكَ مِنَ الْاٰيٰتِ وَ الذِّكْرِ الْحَكِيْمِ ﴿٥٨﴾

हे जे आम्ही तुझ्यापुढे वाचत आहोत, महावाक्ये आहेत आणि बुद्धीयुक्त उपदेश आहेत (५८)

१) याच्याने अभिप्रेत एक तर त्या काही वस्तू आहेत, ज्या शिक्षा म्हणून अल्लाहतआलाने त्यांच्यावर हराम करून दिल्या होत्या. किंवा मग त्या वस्तू आहेत, ज्या त्यांच्या उलेमांनी (धर्म पंडीतांनी) आपल्या परीने हराम करून ठेवल्या होत्या, अल्लाहचा हुकूम नव्हता (कुरतुबी) किंवा अशा वस्तूपण अभिप्रेत असू शकतात. ज्या यांच्या उलेमांनी आपण स्वत: सोच विचार करून त्यांना हराम केले होते आणि या विचार करण्यात त्यांच्या कडून चूक झाली ह. ईसा عليه السلام नी या चुकीचे निरसन करून त्यांना हलाल ठरवून दिले.

२) आणि अल्लाहची उपासना करण्यात आणि त्यांच्या समोर कमीपणा आणि नम्रता जाहीर करण्यात मी आणि तुम्ही द्योघे बरोबर आहोत. यासाठी सरळ मार्ग फक्त हा आहे की, एका अल्लाहची उपासना केली जावी आणि त्याचे उपास्य होण्यात कोणाला त्याच्या बरोबर भागीदार न ठरवले जावे.

३) म्हणजे अशी गुंतागुंतीची काटकारस्थाने आणि त्यांच्या शंकास्पद हालचाली मसीह ﷺ च्या पैगंबरीला नाकारण्यावर होती.
४) पुष्कळशा पैगंबरांनी आपल्या समाजाला कंटाळून उघड साधनाप्रमाणे आपल्या समाजातील समजदार लोकांची मदत मागितली आहे. ज्याप्रमाणे स्वत: नबी ﷺ नी सुरवातीला जेव्हा कुरैश आपल्या आवाहनाच्या मार्गात अडथळा बनलेले होते, तेव्हा आपण हजच्या हंगामात लोकांना आपला साथी आणि मदढगार बनण्यासाठी तयार करीत असत. कारण की, त्यांनी (आपल्या) पालनकर्त्याचा संदेश लोकांपर्यंत पोहचू शकावा ज्यावर अन्सारने याला मान्य केले. आणि नबी ﷺ ची हिजरतपूर्वी आणि हिजरतनंतर मदत केली. याचप्रमाणे येथे ह. ईसा ﷺ नी मदत मागितली ही ती मदत नाही, जी साधनांसाहच्या पद्धतीने मागितली जाते. कारण हे तर शिर्क आहे. आणि प्रत्येक पैगंबर शिर्कचे द्धार बंद करण्यासाठीच येत राहिला आहे. मग ते स्वत: शिर्क करण्याचा प्रयत्न कसा करतील? परंतु कबरपुजकांची नासमज वृत्ती ढु:ख करण्याच्या लायकीची आहे, की ते मरण पावलेल्या व्यक्तींकडे मदत मागण्याला योग्य ठरविण्यासाठी ह. ईसा ﷺ चे म्हणणे ''मन अन्सारी इलल्लाह'' ने आधार घेतात. अल्लाहतआला त्यांना सद्बुद्धी देवो!(आमीन)
५) 'हवारियून' हवारींचे अनेक वचन आहे. म्हणजे अन्सार (मदढगार) ज्याप्रमाणे नबी ﷺ चे फरमान आहे. 'प्रत्येक पैगंबराचा कोणी मदढगार खास असतो. आणि माझा मदढतगार जुबैर ﷺ आहे.'' (सही बुखारी)
६) ह. ईसा ﷺ च्या काळात सीरियाचा इलाखा रोमनांच्या ताब्यात होता. येथे त्यांच्याकडून जो अधिकारी देण्यात आला होता; तो काफिर होता. यहूद्यांनी ह. ईसा ﷺ च्या विरूद्ध कान भरले की, हे अल्लाह माफ करो! व्याभिचाऱ्याने जन्मलेले आणि फसादी आहे वगैरे वगैरे. त्या अधिकाऱ्याने यांच्या मागणीप्रमाणे ह. ईसा ﷺ ला सुळी देण्याचा निर्णय घेतला. परंतु अल्लाहने ह. ईसा ﷺ ला सुरक्षितपणे आकाशावर उचलून घेतले. आणि त्यांच्या जागी त्यांच्या सारख्या दिसणाऱ्या एका माणसाला त्यांनी सुळावर चढवून दिले. आणि समजत राहिले की, आम्ही ह. ईसा ﷺ ला सुळी दिले आहे. 'मकर' अरबी भाषेत सुक्ष्म गुप्त युक्तीला म्हणतात. आणि या अर्थाने येथे अल्लाहतआलाला 'खयरूल माकेरीन' म्हणण्यात आले आहे. जणू हा मकर वाईटपण होऊ शकतो, जर चुकीच्या उद्देशाने असेल. आणि खैरे म्हणजे चांगला पण असू शकतो, जर चांगल्या उद्देशाने असेल. उर्दूमध्ये मकरचा शब्द फक्त वाईट युक्ती म्हणजे चालबाजीच्याच अर्थात उपयोगात आणला जातो, परंतु अरबी भाषेत असे नाही.
७) ज्याचा खरा अर्थ पुरा पुरा घेण्याचा आहे. माणसाच्या मृत्यूवर जो 'वफात' चा शब्द बोलला जातो; तो याचसाठी की त्याचे शारीरिक अधिकार पूर्णपणे काढून घेतले जातात. या अनुषंगाने मृत्यू त्याच्या अर्थाच्या वेगवेगळ्या स्वरूपात केवळ एक स्वरूप आहे. झोपेत सुद्धा कारण की,मानवी अधिकार तात्पुरत्या स्वरूपाचे काढून घेण्यात येतात. यासाठी झोपेवर सुद्धा कुरआनाने 'वफात' शब्दाचा वापर केला आहे. ज्याने माहित झाले की, याचा खरा आणि मूळ अर्थ पूर्ण पूर्ण घेण्याचेच आहे. म्हणजे हे ईसा ﷺ! तुला यहूद्यांच्या कारस्थानापासून वाचवून पूर्णपणे आपल्याकडे आकाशांवर उचलून घेईल. तात्पर्य झालेही असेच आणि काहींनी याचा मृत्यूचाच अर्थ घेतला आहे; परंतु त्यांनी या बरोबर हे (पण) सांगितले आहे की, शब्दात पुढे मागे करून देण्यात आले आहे, म्हणजे 'राफेअुका' (मी आपल्याकडे उचलून घेणार आहे.) चा अर्थ पहिला आहे. आणि 'मुतवफ्फीका' (मृत्यू देणार आहे.) चा अर्थ शेवटी म्हणजे मी तुला आकाशावर उचलून घेईल. आणि मग जेव्हा दुसऱ्यांदा जगात अवतरण होईल त्यावेळी मृत्यू देईन म्हणजे यहूद्यांच्या हाताने तू ठार होणार नाहीस.परंतु तुला नैसर्गिकच मृत्यू येईल. (फत्हुल कदीर व इब्ने कसीर)
८) याच्याने अभिप्रेत त्या आक्षेपांचे निरसन आहे, जे यहूदी आपल्यावर घेत होते. नबी ﷺ च्या मार्फत त्यांचे (ह. ईसा ﷺ) निर्दोषत्व जगासमोर जाहीर करण्यात आले.
९) याच्याने अभिप्रेत ख्रिस्त्यांचे ते जागतिक वर्चस्व आहे. जे यहूद्यांवर कयामतपर्यंत राहील. म्हणजे ते आपल्या चुकीच्या श्रद्धांनी शेवटच्या मुक्ती पासून वंचितच् राहतील.

إِنَّ مَثَلَ عِيسَىٰ عِندَ اللَّهِ كَمَثَلِ آدَمَ ۖ خَلَقَهُ مِن تُرَابٍ ثُمَّ قَالَ لَهُ كُن فَيَكُونُ ﴿٥٩﴾

**नि:संशय ईसाचे उदाहरण अल्लाहजवळ आदमच्या उदाहरणासारखे आहे. ज्याला मातीपासून निर्माण केले, (आणि) म्हटले होऊन जा; आणि तो होऊन गेला ५९**

الْحَقُّ مِن رَّبِّكَ فَلَا تَكُن مِّنَ الْمُمْتَرِينَ ﴿٦٠﴾

**तुझ्या पालनकर्त्याकडून सत्य हेच आहे, खबरदार! शंका घेणाऱ्यांमधून होऊ नकोस ६०**

فَمَنْ حَاجَّكَ فِيهِ مِن بَعْدِ مَا جَاءَكَ مِنَ الْعِلْمِ فَقُلْ تَعَالَوْا نَدْعُ أَبْنَاءَنَا وَأَبْنَاءَكُمْ وَنِسَاءَنَا وَنِسَاءَكُمْ وَأَنفُسَنَا وَأَنفُسَكُمْ ثُمَّ نَبْتَهِلْ فَنَجْعَل لَّعْنَتَ اللَّهِ عَلَى الْكَاذِبِينَ ﴿٦١﴾

**यासाठी जो मनुष्य, आपल्या जवळ ज्ञान आल्यानंतर सुद्धा आपल्याशी यांत झगडेल तर आपण सांगून टाका की, या आम्ही तुम्ही आपापल्या मुलांना आणि आम्ही तुम्ही आपआपल्या स्त्रियांना आणि आम्ही तुम्ही खास आपल्या आपल्या जीवांना बोलावून घ्यावे. मग आम्ही नम्रतेने विनवणी करावी. आणि खोटारड्यावर अल्लाहची धुत्कार (फिटकार) टाकावी[१] ६१**

إِنَّ هَٰذَا لَهُوَ الْقَصَصُ الْحَقُّ ۚ وَمَا مِنْ إِلَٰهٍ إِلَّا اللَّهُ ۚ وَإِنَّ اللَّهَ لَهُوَ الْعَزِيزُ الْحَكِيمُ ﴿٦٢﴾

**खचितच् फक्त हेच सत्य कथन आहे. आणि कोणी उपास्य सत्यावर नाही. शिवाय अल्लाहतआलाच्या, आणि नि:संशय अल्लाहतआला सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे ६२**

فَإِن تَوَلَّوْا فَإِنَّ اللَّهَ عَلِيمٌ بِالْمُفْسِدِينَ ﴿٦٣﴾

**मग, तरीपण कबूल करणार नाही, तर अल्लाहतआलापण चांगल्या प्रकारे फसादींना (समाजकंटकांना) ओळखून आहे ६३**

قُلْ يَا أَهْلَ الْكِتَابِ تَعَالَوْا إِلَىٰ كَلِمَةٍ سَوَاءٍ بَيْنَنَا وَبَيْنَكُمْ أَلَّا نَعْبُدَ إِلَّا اللَّهَ وَلَا نُشْرِكَ بِهِ شَيْئًا وَلَا يَتَّخِذَ بَعْضُنَا بَعْضًا أَرْبَابًا مِّن دُونِ اللَّهِ ۚ فَإِن تَوَلَّوْا فَقُولُوا اشْهَدُوا بِأَنَّا مُسْلِمُونَ ﴿٦٤﴾

**आपण सांगून टाका की, अहो ग्रंथधारी लोकांनो! अशा न्यायपूर्ण गोष्टीकडे या, जी आमच्यात आणि तुमच्यात समान आहे; की आम्ही अल्लाहतआलाशिवाय कोणाची उपासना करू नये आणि न कुणाला त्याच्याबरोबर भागीदार बनवावे[२]; न अल्लाहतआलाला सोडून आपसांत एक दुसऱ्याला 'रब' (पालनकर्ता) बनवावे[३]. मग जर ते तोंड फिरवतील, तर तुम्ही सांगून टाका की, साक्षीदार रहा की, आम्ही तर मुसलमान (आज्ञाधारक) आहोत[४] ६४**

يَا أَهْلَ الْكِتَابِ لِمَ تُحَاجُّونَ فِي إِبْرَاهِيمَ وَمَا أُنزِلَتِ التَّوْرَاةُ وَالْإِنجِيلُ إِلَّا مِن بَعْدِهِ ۚ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿٦٥﴾

**अहो ग्रंथधारी लोकांनो ! तुम्ही इब्राहीमच्या बाबतीत का झगडतात? वास्तविक तौरात आणि इंजील तर, त्यांच्यानंतर अवतरीत केली गेली.काय तुम्ही तरी सुद्धा समजत नाही[५]? ६५**

هَا أَنتُمْ هَٰؤُلَاءِ حَاجَجْتُمْ فِيمَا لَكُم بِهِ عِلْمٌ فَلِمَ تُحَاجُّونَ فِيمَا لَيْسَ لَكُم بِهِ عِلْمٌ ۚ وَاللَّهُ يَعْلَمُ وَأَنتُمْ لَا تَعْلَمُونَ ﴿٦٦﴾

**ऐका तुम्ही लोक यात झगडून चुकला ज्याचे तुम्हाला ज्ञान होते, मग या गोष्टीत का झगडतात, ज्याचे तुम्हाला ज्ञानच नाही[६] आणि अल्लाहतआला जाणतो आणि तुम्ही जाणत नाही ६६**

مَا كَانَ إِبْرَاهِيمُ يَهُودِيًّا وَلَا نَصْرَانِيًّا وَلَٰكِن كَانَ حَنِيفًا مُّسْلِمًا وَمَا كَانَ مِنَ الْمُشْرِكِينَ ﴿٦٧﴾

**इब्राहीम तर यहूदी पण नव्हते आणि खिस्ती पण नव्हते किंबहुना ते एकनिष्ठ व मुसलमान होते[७]. ते मुशरिक पण नव्हते ६७**

१) हे महावाक्य 'आयते मुबाहिला' म्हणवले जाते. 'मुबाहिला' चा अर्थ आहे, दोन पक्षकारांचा एक दुसऱ्यावर लानत म्हणजे बद्दुआ करणे. अर्थ असा की जेव्हा दोन पक्षांत कुठल्या गोष्टीच्या सत्य आणि असत्य होण्यांत मतभेद व झगडा असेल आणि पुराव्यावरून तो संपेल असे वाटत नसेल, तर दोन्ही पक्ष अल्लाहच्या दरबारात अशी दुआ करतील की, या अल्लाह! आमच्या दोघांपैकी जो खोटा असेल,त्यावर लानत कर, याची थोडक्यात पार्श्वभूमी अशी आहे की, ९ हिजरीमध्ये नजरानहून खिस्त्यांचे एक शिष्टमंडळ नबी ﷺ च्या सेवेत हजर झाले. आणि ह. ईसा عليه السلام च्या बाबतीत ते ज्या अतिशयोक्ती पूर्ण श्रद्धा बाळगत होते, याच्यावर वादविवाद करू लागले. शेवटी हे महावाक्य अवतीर्ण झाले आणि आपण ﷺ नी त्यांना मुबाहिलाचे आवाहन दिले. ह.अली رضي الله عنه आणि ह.फातमा आणि ह.हसन व हुसेन رضي الله عنهم

यांनापण बरोबर घेतले आणि खिस्त्यांना पण सांगितले की, तुम्ही पण आपल्या पोरासोरांना बोलावून घ्या आणि मग मिळून खोट्यांवर लानत ची बद्दुआ करू. खिस्त्यांनी आपसांत विचार विनिमयानंतर मुबाहिला करण्यापासून पळ काढला आणि असे म्हणणे पुढे केले की, आपण आमच्या कडून जे इच्छितात, ते देण्यास आम्ही तयार आहोत. तात्पर्य आपण ﷺ नी त्यांच्यावर जिझीया मुकर्रर करून दिला. ज्याच्या वसुलीसाठी आपण ﷺ नी ह. अबुउबैदा बिन जर्राह ؓ ला, ज्यांना आपण ﷺ नी अमीने उम्मत (उम्मतचे विश्वसनीय) ची पदवी (खिताब) दिली होती, त्यांचे बरोबर पाठविले (तफसीर इब्ने कसीर व फत्हुल कदीर) याच्या पुढच्या महावाक्यात ग्रंथधारी लोकांना (यहूदी आणि खिस्त्यांना) एकेश्वरवादाचे आवाहन करण्यात येत आहे.

२) न कोण्या मूर्तींची, न क्रुसाची, न अग्नीची आणि न कोण्या आणखी वस्तूची परंतु एका अल्लाहची उपासना केली जावी जसे की, सर्व पैगंबरांचे आवाहन राहिले आहे.

३) हा एक तर या गोष्टीकडे इशारा आहे की, तुम्ही ह.मसीह عليه السلام आणि ह.उजैर عليه السلام च्या 'रब' होण्याची श्रद्धा (अकीदा) बनवून ठेवली आहे. हे साफ चूक आहे. ते 'रब' (अल्लाह) नाहीत; माणसेच आहेत. दुसरा, या गोष्टीकडे इशारा आहे, की तुम्ही आपल्या 'अहबार व रूहबान'' (यहूद्यांचे धर्मगुरू आणि खिस्त्यांचे संन्याशी) ना हलाल आणि हराम ठरविण्याचा जो अधिकार देऊन ठेवला आहे; हे पण त्यांना 'रब' बनविणे आहे. जसे की महावाक्य 'इत्तखजु अहबारहूम'' (सू. तौबा - ३१) याला साक्ष आहे. (कारण की,) हलाल व हरामचा अधिकारपण फक्त अल्लाहलाच आहे. (इब्ने कसीर व फत्हुल कदीर)

४) सहीह बुखारी मध्ये आहे की, कुरआन करीमच्या या हुकूमाप्रमाणे आपण ﷺ नी हिरक्ल रोमच्या बादशहाला पत्र लिहिले; आणि त्यात या महावाक्याच्या हवाल्याने इस्लामचे कबूल करण्याचे आमंत्रण दिले आणि त्याला सांगितले की, जर तू मुसलमान होऊन गेला तर तुला दुप्पट प्रतिफळ (अजर) मिळेल. नाही तर सर्व प्रजेचा गुनाहपण तुझ्यावरच राहील.''इस्लाम कबूल करून घे; सुरक्षित राहशील. इस्लाम कबूल करून घे, अल्लाहतआला तुला दुप्पट प्रतिफळ देईन. परंतु जर इस्लाम कबूल करण्याला तू नकार दिलास तर प्रजेचा गुनाहपण तुझ्यावरच राहील.'' (सहीह बुखारी) कारण की, प्रजेच्या इस्लाम कबूल न करण्याचे सबबपण तूच राहशील. या महावाक्यात चर्चीत तीन गोष्टी म्हणजे

१) फक्त अल्लाहचीच उपासना करणे

२) त्याच्या बरोबर कोणाला भागीदार न बनविणे

३) आणि कोणाला शरिअत बनवण्यात अल्लाहचे स्थान न देणे, तो एकेश्वरवादाचा एकमेव कलमा आहे ज्यावर ग्रंथधारी लोकांना एकत्रित येण्याचे आमंत्रण देण्यात आले........ म्हणून या उम्मतच्या वेगवेगळ्या सिलसिल्यांना जमा करण्यासाठी पण या तीन मुद्द्यांवर एकमेव कलमा पहिल्या प्रथम पाया बनविला जावा.

५) ह.इब्राहीम عليه السلام च्या बाबतीत झगडण्याचा हा अर्थ आहे की, यहूदी आणि खिस्ती दोन्ही दावा करीत होते की, ह.इब्राहीम عليه السلام त्यांच्या धर्मावर होते. वास्तविक तौरात ज्याचेवर यहूदी ईमान ठेवतात. आणि इंजील ज्याला खिस्ती मानीत होते. दोन्ही ह.इब्राहीम عليه السلام च्या नंतर शेकडो वर्षांनी अवतीर्ण झाले. मग ह.इब्राहीम عليه السلام यहूदी किंवा खिस्ती कशाप्रकारे होऊ शकतात? असे म्हणतात की, ह.इब्राहीम عليه السلام व ह.मूसा عليه السلام यांच्यात एक हजार वर्षांचा आणि ह.इब्राहीम عليه السلام व ह. ईसा عليه السلام च्या दरम्यान दोन हजार वर्षांचे अंतर होते. (कुरतुबी)

६) तुमचे ज्ञान आणि प्रामाणिकपणाची तर ही स्थिती आहे की, ज्या गोष्टीचे तुम्हास ज्ञान आहे, म्हणजे आपला धर्म आणि आपल्या पुस्तकाचे याच्या बाबतीत तुमचे झगडे ज्याचा उल्लेख मागील महावाक्यात येऊन चुकला आहे की, असत्य (बेअसल) पण आहे; आणि मूर्खपणाचे प्रदर्शन पण. तर तुम्ही त्या गोष्टीत का झगडतात, ज्याचे तुम्हाला पूर्वीपासून ज्ञान नाही. म्हणजे ह.इब्राहीम عليه السلام चे ज्ञान आणि त्यांच्या मिल्लते हनीफीया (निव्वळ एकतर्फी) च्या बाबतीत ज्याचा पाया एकेश्वरवाद आणि निव्वळ आज्ञापालनावर आहे.

७) 'हनीफन मुस्लेमा' (निव्वळ एकनिष्ठ मुसलमान) म्हणजे शिर्क पासून नाखुष (नाराज) आणि फक्त एका अल्लाहचे उपासक

إِنَّ أَوْلَى النَّاسِ بِإِبْرٰهِيمَ لَلَّذِينَ اتَّبَعُوهُ وَهٰذَا النَّبِيُّ وَالَّذِينَ اٰمَنُوا ۗ وَاللّٰهُ وَلِيُّ الْمُؤْمِنِينَ ﴿٦٨﴾

सर्व लोकांपेक्षा जास्त इब्राहीमजवळ ते लोक आहेत, ज्यांनी त्यांचे सांगणे ऐकले आणि हा पैगंबर आणि ज्या लोकांनी ईमान आणले[१] मोमिनांचा दोस्त आणि आश्रयस्थान अल्लाहच आहे ⑥८

وَدَّتْ طَّآئِفَةٌ مِّنْ أَهْلِ الْكِتٰبِ لَوْ يُضِلُّونَكُمْ ۗ وَمَا يُضِلُّونَ إِلَّآ أَنفُسَهُمْ وَمَا يَشْعُرُونَ ﴿٦٩﴾

ग्रंथधारी लोकांचा एक समूह असे इच्छितो की तुम्हाला आडमार्गी भटकून द्यावे. खरे पाहू जाता ते स्वत: आपल्याला आडमार्गी भटकवीत आहे, आणि हे त्यांना समजत नाही[२] ⑥९

يٰٓأَهْلَ الْكِتٰبِ لِمَ تَكْفُرُونَ بِاٰيٰتِ اللّٰهِ وَأَنتُمْ تَشْهَدُونَ ﴿٧٠﴾

हे ग्रंथधारी लोकांनो! तुम्ही याचे मान्य करणारे असून सुद्धा जाणून बुझून का कुफ्र करीत आहात[३] ⑦०

يٰٓأَهْلَ الْكِتٰبِ لِمَ تَلْبِسُونَ الْحَقَّ بِالْبٰطِلِ وَتَكْتُمُونَ الْحَقَّ وَأَنتُمْ تَعْلَمُونَ ﴿٧١﴾

हे ग्रंथधारी लोकांनो! जाणून बुझून (तुम्ही) सत्य आणि असत्याला का मिसळवितात आणि सत्याला का लपवत आहात[४] ⑦१

وَقَالَت طَّآئِفَةٌ مِّنْ أَهْلِ الْكِتٰبِ اٰمِنُوا بِالَّذِيٓ أُنزِلَ عَلَى الَّذِينَ اٰمَنُوا وَجْهَ النَّهَارِ وَاكْفُرُوٓا اٰخِرَهُ لَعَلَّهُمْ يَرْجِعُونَ ﴿٧٢﴾

आणि ग्रंथधारी लोकांच्या एका गटाने सांगितले जे काही ईमानवाल्यांवर अवतीर्ण झाले आहे, यावर दिवस वर आला की, ईमान आणा; आणि संध्याकाळी काफिर (नाकारणारे) बनून जा. कारण की, या लोकांनी पण फिरून जावे[५] ⑦२

१) अभिप्रेत नबी करीम ﷺ आणि विश्वासू आणि सत्यनिष्ठ आहेत. कारण की इस्लामी धर्मशास्त्र इब्राहीम عليه السلام च्या धर्मशास्त्राशी सर्वात जास्त जवळचे आहे. यासाठी कुरआन करीममध्ये नबी करीम ﷺ ला इब्राहीम عليه السلام च्या धर्माचे अनुकरण करण्याचा आदेश देण्यात आला आहे. 'अनित्तबेअ मिल्लता इब्राहीम हनीफा'' (सू. नहल-१२३) याशिवाय हदीसमध्ये आहे नबी करीम ﷺ चे फरमान आहे ''प्रत्येक पैगंबराचे पैगंबरामधून काही मित्र असतात;माझे मित्र यांच्यातून माझे वडील आणि माझ्या पालनकर्त्याचे दोस्त इब्राहीम عليه السلام आहेत'' मग त्यांनी हीच आयात पठण केली. (तिरमिझी, इब्ने कसीर)

२) हे यहूद्यांच्या त्या द्वेष आणि तिरस्काराचे स्पष्टीकरण आहे, जे ते ईमानवाल्यांबाबत बाळगत होते; आणि याच वंशश्रेष्ठत्वाच्या (एनाद) कारणाने मुसलमानांना आडमार्गी भटकवण्याची इच्छा बाळगत असत. अल्लाहतआलाने म्हटले याप्रमाणे ते स्वत:च नकळत आडमार्गी भटकत आहेत.

३) मान्य करणारे (कायल) होण्याचा अर्थ असा की, तुम्हाला नबी करीम ﷺ ची सत्यता आणि सच्चाई चे ज्ञान आहे.

४) यांत यहूद्यांच्या दोन मोठ्या अपराधांकडे अंगुली निर्देश करून, त्यांना त्यापासून परावृत्त होण्यासंबंधी सांगण्यात येत आहे. पहिला अपराध हा आहे की, सत्य आणि असत्य खरे आणि खोटे यांना एक दुसऱ्यात सरमिसळ करणे की, त्यामुळे लोकांवर सत्य व असत्य स्पष्ट होऊ न शकावे. दुसरा म्हणजे सत्याला लपविणे म्हणजे नबी करीम ﷺ चे जे गुणधर्म तौरात मध्ये लिहिले होते त्यांना लोकांपासून लपविणे कारण की, आपली (ﷺ) सच्चाई कमीत कमी या अनुषंगाने तरी दिसून न यावी. आणि हे दोन्ही अपराध ते जाणून बुजून करीत असत. ज्यामुळे त्यांचा वाईटपणा दुप्पट (जाहीर) झाला होता. त्यांच्या अपराधांकडे अंगुलीनिर्देश सू. बकर: मध्ये करण्यात आला आहे. ''सत्याला असत्याबरोबर मिळवू नका; आणि सत्याला लपवू नका; आणि तुम्ही जाणत आहात'' (सू. बकर :४२) अहले किताबचे शब्द काही भाष्यकारांनी सार्वत्रिक ठेवले आहे. ज्यात यहूदी आणि खिस्ती दोन्ही शामील आहेत. म्हणजे दोघांना वर उल्लेखित अपराधांपासून दूर राहण्याची समज देण्यात आली आहे. काहींजवळ याने अभिप्रेत ती यहूद्यांची घराणी आहेत, जे मदिनेत वास्तव्याला होते.बनुकुरैजा, बनुनजीर आणि बनुकैनकाअ. जास्त बरोबर हीच गोष्ट वाटते; कारण की, मुसलमानांचा सरळ सरळ व्यवहार त्यांच्याशीच होता आणि हेच नबी ﷺ च्या विरोधात अग्रेसर होते.

५) यहूद्यांच्या आणखी एका चालीचा उल्लेख आहे. ज्याच्याने ते मुसलमानांना गुमराह करू इच्छित होते की, त्यांनी आपसात असे ठरविले की, सकाळी मुसलमान होऊन जावे आणि संध्याकाळी पुन्हा नाकारणारे (काफिर) बनून जावे; कारण की मुसलमानांच्या मनात सुद्धा संशय निर्माण व्हावा की, या लोकांनी इस्लाम कबूल केल्यानंतर दुसऱ्यांदा आपल्या धर्मात परत गेले आहेत तर शक्यता आहे की, इस्लाममध्ये असे दोष आणि अपूर्णता असावी जी यांच्या लक्षात आली असावी.

وَلَا تُؤْمِنُوْٓا اِلَّا لِمَنْ تَبِعَ دِيْنَكُمْ ؕ قُلْ اِنَّ الْهُدٰى هُدَى اللّٰهِ ۙ اَنْ يُّؤْتٰٓى اَحَدٌ مِّثْلَ مَآ اُوْتِيْتُمْ اَوْ يُحَآجُّوْكُمْ عِنْدَ رَبِّكُمْ ؕ قُلْ اِنَّ الْفَضْلَ بِيَدِ اللّٰهِ ۚ يُؤْتِيْهِ مَنْ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ وَاسِعٌ عَلِيْمٌ ﴿٧٣﴾

**आणि तुमच्या धर्मावर चालणाऱ्यांशिवाय दुसऱ्या कोणाचा भरोसा करू नका[१]. आपण सांगून टाका की, नि:संशय हिदायत तर अल्लाहचीच हिदायत आहे[२]. आणि (असे पण सांगतात की, या गोष्टीचा पण विश्वास करू नका) की, कुणाला याप्रमाणे दिला जावा, जसे तुम्हाला दिले गेले आहे[३]. किंवा असे की, हे तुमच्याशी तुमच्या पालनकर्त्याजवळ झगडा करतील. आपण सांगून टाका की, कृपा (करणे) तर अल्लाहच्याच हातात आहे. तो ज्याला इच्छेल त्याला देईन आणि अल्लाहतआला अति उदार आणि सर्वज्ञानी आहे ७३**

يَّخْتَصُّ بِرَحْمَتِهٖ مَنْ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ ذُو الْفَضْلِ الْعَظِيْمِ ﴿٧٤﴾

**तो आपल्या दयेसाठी ज्याला पाहिजे त्याची निवड करेन आणि अल्लाहतआला महान कृपानिधी आहे[४] ७४**

وَمِنْ اَهْلِ الْكِتٰبِ مَنْ اِنْ تَاْمَنْهُ بِقِنْطَارٍ يُّؤَدِّهٖٓ اِلَيْكَ ۚ وَمِنْهُمْ مَّنْ اِنْ تَاْمَنْهُ بِدِيْنَارٍ لَّا يُؤَدِّهٖٓ اِلَيْكَ اِلَّا مَا دُمْتَ عَلَيْهِ قَآئِمًا ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمْ قَالُوْا لَيْسَ عَلَيْنَا فِى الْاُمِّيّٖنَ سَبِيْلٌ ۚ وَيَقُوْلُوْنَ عَلَى اللّٰهِ الْكَذِبَ وَهُمْ يَعْلَمُوْنَ ﴿٧٥﴾

**आणि काही ग्रंथधारी लोक तर असे आहेत की, जर तू त्यांना खजिन्याचा विश्वस्त बनवून देशील तरी सुद्धा ते तुला परत करतील आणि यांच्यातून काही लोक असे सुद्धा आहेत की जर तू त्यांना एक दिनारपण ठेव (म्हणून) देशील, तर ते तुला परत देणार नाहीत. हां! ही वेगळी गोष्ट आहे की, तू त्यांच्यामागे (सारखा) तगादा लावशील. असे यासाठी की, त्यांनी सांगून टाकले आहे की, आमच्यावर या अडाणी लोकांचा हक्क मारण्यात काही गुनाह नाही, हे जाणून बुजून अल्लाहतआलावर खोट्या गोष्टी थोपतात[५] ७५**

بَلٰى مَنْ اَوْفٰى بِعَهْدِهٖ وَاتَّقٰى فَاِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الْمُتَّقِيْنَ ﴿٧٦﴾

**हां! (विचारपुस होईल) तथापि जो मनुष्य आपला करार पुरा करीन, आणि अल्लाहतआलाला भिईल तर अल्लाहतआला पण अशा परेजगार लोकांना मित्र राखतो[६] ७६**

اِنَّ الَّذِيْنَ يَشْتَرُوْنَ بِعَهْدِ اللّٰهِ وَاَيْمَانِهِمْ ثَمَنًا قَلِيْلًا اُولٰٓئِكَ لَا خَلَاقَ لَهُمْ فِى الْاٰخِرَةِ وَلَا يُكَلِّمُهُمُ اللّٰهُ وَلَا يَنْظُرُ اِلَيْهِمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ وَلَا يُزَكِّيْهِمْ ۖ وَلَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٧٧﴾

**नि:संशय जे लोक अल्लाहतआलाच्या करार आणि आपल्या शपथांना अत्यल्प किंमतीवर विकून टाकतात त्यांच्यासाठी परलोकांत काहीही वाटा नाही. अल्लाहतआला त्यांचेशी संभाषण देखील करणार नाही; आणि कयामतच्या दिवशी त्यांच्याकडे बघणार सुद्धा नाही. न त्यांना पाक साफ करेन; आणि त्यांच्यासाठी यातनादायक शिक्षा आहे[७] ७७**

१) हे आपसांत त्यांनी एक दुसऱ्याला सांगितले की, तुम्ही उघडपणे इस्लामचा अंगिकार केल्याचे जरूर दाखवा परंतु आपल्या धर्मा (यहूद) च्या शिवाय दुसऱ्या गोष्टींवर विश्वास ठेवू नका.

२) फक्त याच्याने त्यांच्या चालबाजींची खरी हकीकत स्पष्ट करणे हा उद्देश आहे. चालबाजीने काही होणार नाही कारण की, हिदायत तर अल्लाहच्या हातात आहे. तो ज्याला हिदायत देऊन देईल किंवा देऊ इच्छेल तुमचे धोका देणे त्याच्या मार्गात अडथळा बनू शकत नाही.

३) हे पण यहूद्यांचे म्हणणे आहे. म्हणजे हे पण मान्य करू नका की ज्याप्रमाणे तुमच्यात पैगंबरी वगैरे राहिली आहे. ही कोण्या दुसऱ्याला पण मिळू शकते आणि अशा प्रकारे यहूदीयत शिवाय आणखी कोणी धर्म सत्य असू शकतो.

४) या महावाक्याचे दोन अर्थ सांगण्यात येतात एक हा की, यहूद्यांचे मोठमोठे धर्मगुरू (उलमा) जेव्हा आपल्या शिष्यांना हे शिकवित की, दिवस वर आल्यावर ईमान आणा आणि दिवस मावळल्यावर त्याला नाकारा म्हणजे जे लोक खरोखर मुसलमान आहेत तेपण डावाडोळ होऊन धर्माकडून फिरून जावेत आणि या शिष्यांना पुढे अशी ताकीद करीत असत की, पहा फक्त दाखविण्यापुरते मुसलमान व्हावयाचे आहे. खरोखरच आणि वास्तविक मुसलमान होऊ नका. परंतु यहूदीच रहा आणि असे समजू नका की जसा धर्म जसे पुस्तक (वहय) आणि धर्मशास्त्र आणि जसे ज्ञान आणि (अल्लाहची) कृपा तुम्हास देण्यात आली आहे, तसा कोणा दुसऱ्यालापण दिला जाऊ शकतो

किंवा तुमच्या शिवाय कोणी दुसरा सत्त्यावर आहे, जो तुमच्या विरुद्ध अल्लाहजवळ तुम्हाला चूक ठरवू शकतो. दुसरा अर्थ हा आहे की, हे यहूद्यांनो ! तुम्ही सत्याला दाबून आणि मिटवून टाकण्याचे सर्व प्रयत्न आणि कारस्थाने यासाठी करत आहात की, एक तुम्हाला या गोष्टीचे दु:ख आणि द्वेष आहे की, जसे ज्ञान आणि कृपा वह्य आणि धर्मशास्त्र (शरिअत) आणि धर्म तुम्हास दिला गेला होता, आता तसेच ज्ञान व कृपा आणि धर्म कोण्या दुसऱ्याला का म्हणून दिला गेला? दुसरे तुम्हाला हा अंदेशा आणि धोकापण आहे की, जर सत्याचे हे आमंत्रण वाढीस लागले आणि त्यांनी आपला पाया मजबूत करून घेतला तर फक्त असे नाही की, जगात तुम्हाला जो सन्मान आणि प्रतिष्ठा प्राप्त आहे, तो जात राहील. किंबहुना तुम्ही जे सत्य लपवून ठेवले आहे त्याचा पण पर्दाफाश होऊन जाईल. वास्तविक तुम्हाला ठाऊक असावयास पाहिजे की, धर्म व शरिअत ही अल्लाहची कृपा आहे. आणि ही कोणाची, मिरास (वाडवडीलांची मालमत्ता) नाही. परंतु तो आपली कृपा ज्याला इच्छितो त्याला देतो आणि हे त्याला (चांगल्याप्रकारे) ठाऊक आहे की, ही कृपा कोणावर करायला पाहिजे.

५) अशिक्षित, अडाणी लोकांनी अभिप्रेत अरबचे बहुदेववादी लोक आहेत. यहूद्यांचे माल गिळंकृत करणारे (खाईन) लोक असा दावा करीत की, हे लोक मुशरिक आहेत. म्हणून त्यांचा माल हडप करून घेणे योग्य आहे. यात काही पाप नाही. अल्लाहतआलाने म्हटले की, हे अल्लाहवर खोटे खोटे थोपत आहे. अल्लाहतआला अशाप्रकारे कोणाचा माल हडप करून घेण्याची परवानगी कशी बरे देईन? आणि काही भाष्यांच्या रिवायतीत आहे की, नबी ﷺ नी पण हे ऐकून म्हटले की, ''अल्लाहच्या शत्रूंनी खोटे सांगितले, अज्ञान काळांतील सर्व गोष्टी माझ्या पायाखाली आहेत, अमानत (ठेवी) शिवाय, कीती कुठल्याही परिस्थितीत परत केली जाईल. मग ती कोण्या सदाचाऱ्याची असो किंवा दुराचाऱ्याची असो.'' (इब्ने कसीर फत्हुल कदीर) खेद आहे की, यहूद्यांप्रमाणे आज काही मुसलमान सुद्धा मुशरिकांचा माल गिळंकृत करण्यासाठी म्हणतात की दारूल हरब चे व्याज जाएज (योग्य) आहे. आणि हरबी च्या मालासाठी काही परहेजगारी नाही. वास्तविक ज्या देशाला दारूल हरबा म्हणून अशा प्रकारे माल खातात; त्यांच्याशी लढण्यासाठी कधी कवडीपण उचलून देत नाही.

दारूल हरब: - म्हणजे ज्या देशात मुसलमान आणि गैरमुसलमानांमध्ये धार्मिक युध्द राहिले असेल.

६) 'करार पुरा करावा' चा अर्थ तो अहद (वचन) पुरा करावा जो ग्रंथधारी लोकांशी किंवा पैगंबराच्या मार्फत त्यांच्या उम्मतीकडून नबी करीम ﷺ वर ईमान आणण्याच्या बाबतीत घेण्यात आला आहे. आणि 'परहेजगारी' करावी म्हणजे अल्लाहतआलाने ज्या गोष्टी निषीद्ध केल्या आहेत;त्यापासून स्वत:ला वाचवावे आणि त्या गोष्टींवर अंमलबजावणी करावी, ज्या नबी करीम ﷺ नी सांगितल्या आहेत. खचितच् असे लोक न फक्त अल्लाहकडून विचारपूस करण्यापासून सुरक्षित राहतील, किंबहुना अल्लाहतआलाच्या दरबारात प्रिय राहतील.

७) चर्चित व्यक्तिच्या उलट दुसऱ्या लोकांच्या स्थिती वर्णन करण्यात येत आहे. आणि हे (वर्णन) दोन प्रकारच्या लोकांना आपल्यात सामावून घेते. एक तर ते लोक जे अल्लाहशी केलेल्या कराराला आणि आपल्या शपथांना पाठीमागे टाकून थोड्याशा ऐहिक फायद्यासाठी नबी करीम ﷺ वर ईमान आणले नाही. दुसरे ते लोक आहेत जे खोट्या शपथा खाऊन आपला व्यापारी माल (सौदा) विकतात; किंवा कोणाचा माल हडप करून टाकतात, जसे की हदीसमध्ये आले आहे. उदाहरणार्थ आपण ﷺ नी सांगितले ''कोणी मनुष्य कोणाचा माल हडप करण्यासाठी खोटी शपथ खाईल, तर तो अल्लाहतआलाला अशा स्थितीत भेटेन की, अल्लाह त्याच्यावर फारच क्रोधीत असेल.'' (सहीह बुखारी व स. मुस्लीम) आणखी सांगितले की तीन व्यक्तींशी न अल्लाहतआला संभाषण करील न त्यांच्याकडे पाहील न त्यांना गुन्ह्यांपासून पाकसाफ करेन. आणि त्यांच्यासाठी यातना दायक शिक्षा आहे. याच्यातून एक तो मनुष्य आहे जो खोट्या शपथेने आपला माल विकतो. (मुसनद अहमद, स. मुस्लिम) निरनिराळ्या हदीसींमध्ये या गोष्टी आलेल्या आहेत.

وَإِنَّ مِنْهُمْ لَفَرِيقًا يَلْوُونَ أَلْسِنَتَهُم بِالْكِتَٰبِ لِتَحْسَبُوهُ
مِنَ الْكِتَٰبِ وَمَا هُوَ مِنَ الْكِتَٰبِ وَيَقُولُونَ هُوَ مِنْ
عِندِ اللَّهِ وَمَا هُوَ مِنْ عِندِ اللَّهِ وَيَقُولُونَ عَلَى اللَّهِ
الْكَذِبَ وَهُمْ يَعْلَمُونَ ﴿٧٨﴾

**खचितच् त्यांच्यांत असा गट सुद्धा आहे जो पुस्तक वाचतांना आपली जीभ वेडी वाकडी करतो, कारण तुम्ही याला पुस्तकाचाच भाग समजावा; वास्तविक खरे पाहता ते पुस्तकामधून नाही आणि ते म्हणतात की हे अल्लाहतआलाकडून आहे. वास्तविक खरे, पाहता ते अल्लाहकडून नाही; ते तर जाणून बुजून अल्लाहतआलावर खोटे बोलतात[१] (७८)**

مَا كَانَ لِبَشَرٍ أَن يُؤْتِيَهُ اللَّهُ الْكِتَٰبَ وَالْحُكْمَ وَالنُّبُوَّةَ
ثُمَّ يَقُولَ لِلنَّاسِ كُونُوا عِبَادًا لِّي مِن دُونِ اللَّهِ وَلَٰكِن
كُونُوا رَبَّٰنِيِّينَ بِمَا كُنتُمْ تُعَلِّمُونَ الْكِتَٰبَ وَبِمَا كُنتُمْ
تَدْرُسُونَ ﴿٧٩﴾

**कोण्या अशा माणसाला ज्याला अल्लाहतआला पुस्तक व ज्ञान आणि पैगंबरी देईल त्याला हे शोभत नाही की, तरी सुद्धा लोकांना सांगावे की तुम्ही अल्लाहलासोडून माझे भक्त बनून जा. परंतु तो तर हे सांगेन की तुम्ही सर्व अल्लाहचे होऊन जा[२] यासाठी की तुम्ही लोक (दुसऱ्यांना) पुस्तक शिकवत राहातात आणि यासाठी की तुम्ही (स्वत:लाही) वाचत राहतात[३] (७९)**

ع ٨/٩ ١٦
وَلَا يَأْمُرَكُمْ أَن تَتَّخِذُوا الْمَلَٰٓئِكَةَ وَالنَّبِيِّۦنَ أَرْبَابًا
أَيَأْمُرُكُم بِالْكُفْرِ بَعْدَ إِذْ أَنتُم مُّسْلِمُونَ ﴿٨٠﴾

**आणि असे (होऊ शकत) नाही की ते तुम्हास देवदूत आणि पैगंबरांना 'रब' बनविण्याचा आदेश देतील काय तो तुमच्या मुसलमान होण्यावर सुद्धा तुम्हाला कुफ्रचा आदेश देईल[४] (८०)**

ع ८/९ १६

وَإِذْ أَخَذَ اللَّهُ مِيثَٰقَ النَّبِيِّۦنَ لَمَا ءَاتَيْتُكُم مِّن كِتَٰبٍ
وَحِكْمَةٍ ثُمَّ جَاءَكُمْ رَسُولٌ مُّصَدِّقٌ لِّمَا مَعَكُمْ
لَتُؤْمِنُنَّ بِهِ وَلَتَنصُرُنَّهُ قَالَ ءَأَقْرَرْتُمْ وَأَخَذْتُمْ
عَلَىٰ ذَٰلِكُمْ إِصْرِي قَالُوا أَقْرَرْنَا قَالَ فَاشْهَدُوا
وَأَنَا مَعَكُم مِّنَ الشَّٰهِدِينَ ﴿٨١﴾

**जेव्हा अल्लाहतआलाने पैगंबरांजवळून वचन घेतले की, जे काही मी तुम्हास पुस्तक व ज्ञान देईन मग तुमच्यापाशी तो पैगंबर (रसूल) येईल, जो तुमच्याजवळील गोष्टीला सत्य सांगेन, तर तुमच्यासाठी त्याच्यावर ईमान आणणे आणि त्याची मदत करणे, आवश्यक आहे[५]. सांगितले की, काय तुम्ही याला कबूल करता आणि यावर माझी जबाबदारी घेत आहात? सगळ्यांनी सांगितले की, हा! आम्हाला कबूल आहे. सांगितले की आता साक्षीदार रहा, आणि मी पण तुमच्या बरोबर साक्षीदारांमधून आहे (८१)**

१) ही यहूद्यांच्या त्या लोकांची चर्चा आहे, ज्यांनी अल्लाहचे पुस्तक (तौरात) मध्ये ज्यांनी हेरफेर आणि बदलच केला नाही किंबहुना दोन अपराध आणखी पण केले, एक तर जिभेला मुरडून पुस्तकाचे शब्द वाचले, ज्याच्याने सर्व सामान्य लोकांना घटनेच्या विरूद्ध परिणाम देण्यात ते यशस्वी रहात. दुसरी गोष्ट अशी की, ते आपल्या स्वत: घडविलेल्या गोष्टींना अल्लाहकडून आहेत असे भासवत. दुर्दैवाने उम्मते मोहंमदियाच्या धार्मिक पुढाऱ्यांनी सुद्धा नबी ﷺ ची भविष्यवाणी ''तुम्ही तुमच्या पूर्वीच्या उम्मतींच्या पावलांवर पाऊल ठेवून त्यांचे अनुकरण कराल.'' च्या प्रमाणे खूपच प्रमाणांत असे लोक आहेत, जे ऐहिक आवश्यकतेपोटी किंवा गटागटांच्या द्वेषाने किंवा फिकही जमुद (आपापल्या पंथाच्या हटधर्मीपणाने) कुरआन करिमशी पण असाच मामला करतात. कुरआनचे महावाक्य वाचतात आणि मसला आपण तयार केलेला सांगतात; जनता समजते की, मौलवी साहेबांनी मसला कुरआनाचा सांगितला आहे. वास्तविक या मसल्यांचा कुरआनशी काही काही संबंध नसतो किंवा महावाक्याच्या अर्थामध्ये हेरफेर (बदल) करून आपल्याला पाहिजे तसा अर्थ सांगितला जातो. कारण की हेच भासविले जाते की, हे अल्लाहकडून आहे. अआजनल्लाह मिनहु !(आमीन)

२) हे खिस्त्यांच्या बाबतीत सांगण्यात येत आहे की, त्यांनी ह. ईसा عليه السلام ला उपास्य बनवून ठेवले आहे. वास्तविक पाहता ते एक मनुष्य होते. ज्यांना पुस्तक, ज्ञान आणि पैगंबरी देण्यात आली होती. आणि असा कोणी माणूस दावा करू शकत नाही की, अल्लाहला सोडून माझे पुजारी आणि सेवक बनून जा. परंतु तो हेच सांगतो की, अल्लाहवाले बूनन जा.

३) म्हणजे अल्लाहच्या पुस्तकाच्या शिक्षणाच्या परिणामामध्ये अल्लाहची ओळख आणि अल्लाहतआलाशी खास

संपर्क आणि संबंध प्रस्तापित झाले पाहिजेत. याचप्रमाणे अल्लाहच्या पुस्तकाचे ज्ञान ठेवणाऱ्यांसाठी हे आवश्यक आहे की, त्याने लोकांनापण कुरआनाचे शिक्षण द्यावे. या महावाक्याने स्पष्ट आहे की, जेव्हा अल्लाहच्या पैगंबरांना हा अधिकार प्राप्त नाही की, त्यांनी लोकांना आपली उपासना करण्याचा आदेश द्यावा; तर इतर कोणाला हा अधिकार कसा पोहचतो? यात त्या धर्मगुरूंना आणि बुजुर्गांसाठी कडक धमकी व फटकार आहे. जे आपल्याकडून धर्मशास्त्र (शरिअत) घडवतात. आणि अल्लाहच्या हलालला ते हराम व हरामाला ते हलाल ठरवितात, की, हदीसीच्या अनुषंगाने हे पण आपली उपासना करविणे आहे. ज्याप्रमाणे ह.अदी बिन हातीम ﷺ नी नबी ﷺ ला सांगितले होते की ग्रंथधारी लोकांनी तर कधी आपल्या गुरूंची उपासना केली नव्हती. मग अल्लाहने असे का सांगितले की, ''त्यांनी आपल्या ''धर्मगुरूंना आपला रब'' बनवून घेतले''. आपण ﷺ नी सांगितले की, ''त्यांचे आपल्या धर्मगुरूंचे असे अनुकरण करणे की, त्यांनी ज्या हलाल ला हराम आणि ज्या हराम ला हलाल करून दिले त्याला त्यांनी बरोबर समजले; हीच त्यांची उपासणा करणे आहे. (तफसीर इब्ने कसीर)

४) आणि पैगंबर आणि देवदूतांना (किंवा आणखी कोणास) अल्लाहच्या विशेषणांनी, परिपूर्ण समजणे (बावर कराना) कुफ्र आहे. तुमच्या मुसलमान होऊन गेल्यावर एक पैगंबर बरे हे काम कसे करू शकेल? कारण की, पैगंबराचे काम तर ईमानचे आमंत्रण देण्याचे आहे. जे अल्लाह जो एकटा आणि त्याचा कोणी सरकतदार नाही, च्या उपासनेचे नांव आहे. काही भाष्यकारांनी याच्या अवतरण्याच्या कारणांत ही गोष्ट सांगितली आहे की, काही मुसलमानांनी या गोष्टीची परवानगी मागितली की, त्यांनी आपणांस (ﷺ) सज्दा करावा; ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले (फत्हुल कदीर) आणि काहींनी याच्या अवतरणाच्या कारणात असे म्हटले आहे की यहूदी आणि ख्रिस्त्यांनी एकत्र येवून नबीﷺ ला म्हटले काय आपण असे इच्छितात की, आम्ही आपली असा प्रकारे उपासना करावी. ज्याप्रमाणे ख्रिस्ती ह.ईसा عليه السلام ची करतात. आपण ﷺ नी सांगितले की, ''मी अल्लाहला शरण जातो या गोष्टीपासून की, आम्ही अल्लाहला सोडून कोण्या दुसऱ्याची उपासना करावी. किंवा कोणास याचा आदेश द्यावा अल्लाहने मला यासाठी पाठविले नाही. तसेच याचा आदेश पण दिला नाही.'' यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले (इब्ने कसीर)

५) म्हणजे प्रत्येक पैगंबरापासून हे वचन घेण्यात आले की, त्याचे जीवन आणि पैगंबरीच्या काळात जर दुसरा पैगंबर आला तर त्यांच्यावर ईमान आणणे आणि त्याची मदत करणे आवश्यक राहील. जेव्हा पैगंबराच्या उपस्थितीत येणाऱ्या नव्या पैगंबरावर स्वतः या पैगंबराने ईमान आणणे आवश्यक आहे, तर त्याच्या अनुयांयाकरीता तर या नव्या पैगंबरावर ईमान आणणे एकदम आवश्यक आहे. काही भाष्यकारांनी 'रसुलुम् मुसद्दीकून' ने अर्रसुलचा अन्वार्थ अभिप्रेत धरला आहे, म्हणजे ह.मोहम्मद रसूल ﷺ च्या बाबतीत, सर्व पैगंबरापासून वचन घेण्यात आले की, जर त्यांच्या काळात ते येऊन जातील तर आपली पैगंबरी बंद करून त्यांच्यावर ईमान आणावे लागेल. परंतु खरोखर असे आहे की, पहिल्या अर्थातच हा दुसरा विषय पण स्वत:च येऊन जातो. म्हणून कुरआनाच्या शब्दांच्या अनुषंगाने पहिला खुलासाच जास्त बरोबर आहे आणि या खुलाशाच्या दृष्टीने पण ही गोष्ट स्पष्ट आहे की, नुबुवते मोहम्मदी ﷺ च्या ज्वलंत दिव्यानंतर कोणत्याही पैगंबराचा दिवा जळू शकत नाही. जसे हदीसमध्ये येते की, एकदा ह.उमर ﷺ तौरातची पाने वाचत होते तर नबी ﷺ हे पाहून फारच क्रोधीत झालेत. आणि त्यांनी सांगितले की, ''शपथ आहे त्या व्यक्तित्त्वाची ज्याच्या कबजात मोहम्मद ﷺ चे प्राण आहेत. की जर मूसा عليه السلام जिवंत होऊन येऊन जातील आणि तुम्ही मला सोडून त्यांच्या मागे लागून जाल तर खचितच् आडमार्गी भटकून जाल'' (मुसनद अहमद इब्ने कसीरच्या हवाल्याने) म्हणजे आता कयामतपर्यंत ज्यांचे आज्ञापालन केले जावे ते फक्त मोहम्मद रसूल ﷺ आहे; आणि मुक्ती त्यांच्या आज्ञापालनात बंदिस्त आहे. कोण्याही इमामच्या अनुकरणांमध्ये किंवा कोण्या बुजुर्गाच्या बैअतमध्ये नाही. जेव्हा कोण्या पैगंबराचे नाणे आता चालू शकत नाही,तर कोणी दुसरे व्यक्तीत्व आज्ञापालन करण्यापासून स्वतंत्र कसे होऊ शकते ? 'इसर्' वचन आणि जबाबदारीच्या अर्थात आहे.

فَمَنْ تَوَلّٰى بَعْدَ ذٰلِكَ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْفٰسِقُوْنَ ﴿٨٢﴾

मग याच्यानंतर सुद्धा जो कोणी फिरून जाईल. तो खचितच् पूर्ण आज्ञाभंजक आहे.[१] ८२

اَفَغَيْرَ دِيْنِ اللّٰهِ يَبْغُوْنَ وَلَهٗٓ اَسْلَمَ مَنْ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ طَوْعًا وَّكَرْهًا وَّاِلَيْهِ يُرْجَعُوْنَ ﴿٨٣﴾

काय ते अल्लाहतआलाच्या धर्माशिवाय आणखी कोण्या धर्माच्या शोधात आहे? वास्तविक सर्व आकाशवाले आणि सर्व पृथ्वीवाले अल्लाहतआलाचेच आज्ञाधारक आहेत. खुशीने असो किंवा नाखुशीने, असो सर्व[२] त्याच्याचकडे परतून जाणार आहेत ८३

قُلْ اٰمَنَّا بِاللّٰهِ وَمَآ اُنْزِلَ عَلَيْنَا وَمَآ اُنْزِلَ عَلٰٓى اِبْرٰهِيْمَ وَاِسْمٰعِيْلَ وَاِسْحٰقَ وَيَعْقُوْبَ وَالْاَسْبَاطِ وَمَآ اُوْتِيَ مُوْسٰى وَعِيْسٰى وَالنَّبِيُّوْنَ مِنْ رَّبِّهِمْ ۖ لَا نُفَرِّقُ بَيْنَ اَحَدٍ مِّنْهُمْ ۖ وَنَحْنُ لَهٗ مُسْلِمُوْنَ ﴿٨٤﴾

आपण सांगून टाका की, आम्ही अल्लाहवर आणि जे काही आमच्यावर अवतीर्ण झाले आहे आणि जे काही इब्राहीम (अ.) वर आणि इस्माईल (अ.) वर आणि इस्हाक आणि याकूब (अ.) आणि त्यांच्या संततीवर उतारले गेले आणि जे काही मूसा (अ.) व ईसा (अ.) आणि दुसरे पैगंबर (अ.) ज्यांना अल्लाहतआलाकडून देण्यात आले, या सर्वांवर ईमान आणले[३]. आम्ही त्यांच्यातून कोणातही भेदभाव करीत नाही. आणि आम्ही अल्लाहतआलाचे आज्ञाधारक आहोत ८४

وَمَنْ يَّبْتَغِ غَيْرَ الْاِسْلَامِ دِيْنًا فَلَنْ يُّقْبَلَ مِنْهُ ۚ وَهُوَ فِي الْاٰخِرَةِ مِنَ الْخٰسِرِيْنَ ﴿٨٥﴾

जो मनुष्य इस्लाम शिवाय दुसरा धर्म शोधेल त्याचा धर्म कबूल केला जाणार नाही. आणि तो परलोकांत नुकसान होणाऱ्यापैकी होईल ८५

كَيْفَ يَهْدِي اللّٰهُ قَوْمًا كَفَرُوْا بَعْدَ اِيْمَانِهِمْ وَشَهِدُوْٓا اَنَّ الرَّسُوْلَ حَقٌّ وَّجَآءَهُمُ الْبَيِّنٰتُ ۗ وَاللّٰهُ لَا يَهْدِي الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ﴿٨٦﴾

अल्लाहतआला त्या लोकांना कशी हिदायत देणार? जे ईमान आणल्यानंतर आणि पैगंबराच्या सत्यतेची ग्वाही देण्या, आणि आपल्याजवळ ढळढळीत पुरावे आल्यानंतर काफिर होऊन जातील. अल्लाहतआला अशा न्यायशून्य लोकांना सरळ मार्गावर आणत नाही ८६

اُولٰٓئِكَ جَزَآؤُهُمْ اَنَّ عَلَيْهِمْ لَعْنَةَ اللّٰهِ وَالْمَلٰٓئِكَةِ وَالنَّاسِ اَجْمَعِيْنَ ﴿٨٧﴾

त्यांची तर हीच शिक्षा आहे की, त्यांच्यावर अल्लाहतआलाची आणि देवदूतांची आणि सर्व लोकांकडून धिक्कार होवो ! ८७

خٰلِدِيْنَ فِيْهَا ۚ لَا يُخَفَّفُ عَنْهُمُ الْعَذَابُ وَلَا هُمْ يُنْظَرُوْنَ ﴿٨٨﴾

ज्यांत ते नेहमी पडून राहतील; त्यांच्यावरून शिक्षा हलकी केली जाणार नाही आणि त्यांना (कुठलीही) सुटी देण्यात येणार नाही ८८

اِلَّا الَّذِيْنَ تَابُوْا مِنْۢ بَعْدِ ذٰلِكَ وَاَصْلَحُوْا ۫ فَاِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٨٩﴾

परंतु जे लोक याच्यानंतर पश्चात्ताप व्यक्त करतील आणि (आपल्यांत) सुधारणा करतील तर नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे[४] ८९

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا بَعْدَ اِيْمَانِهِمْ ثُمَّ ازْدَادُوْا كُفْرًا لَّنْ تُقْبَلَ تَوْبَتُهُمْ ۚ وَاُولٰٓئِكَ هُمُ الضَّآلُّوْنَ ﴿٩٠﴾

नि:संशय जे लोक[५] आपल्या ईमान आणल्यानंतर कुफ्र करतील मग कुफ्र मध्ये (आणखी) पुढे जातील त्यांचा पश्चात्ताप कधीच कधीच कबूल केला जाणार नाही[६]. हेच आडमार्गी भटकणारे लोक आहेत ९०

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَمَاتُوْا وَهُمْ كُفَّارٌ فَلَنْ يُّقْبَلَ مِنْ اَحَدِهِمْ مِّلْءُ الْاَرْضِ ذَهَبًا وَّلَوِ افْتَدٰى بِهٖ ۭ اُولٰٓئِكَ لَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ وَّمَا لَهُمْ مِّنْ نّٰصِرِيْنَ ﴿٩١﴾ ع ٩ ١١ ١٧

हां! ज्या लोकांनी कुफ्र केले आणि मरेपर्यंत काफिर राहिले, त्यांच्यापैकी कोणी जर पृथ्वीच्या भारोभार सोने देईन की जणू प्राणमूल्यच (फिदिया) असावे, तरी सुद्धा अजिबात कबूल केले जाणार नाही; हेच लोक आहेत ज्यांच्यासाठी यातनामय शिक्षा आहे आणि त्यांचा कोणी मददगार नाही[७] ९१ ९ ११ १७

(१) हे ग्रंथधारी लोक (यहूदी आणि ख्रिस्ती) आणि दुसऱ्या धर्मवाल्यांना तंबी आहे की, मोहम्मद ﷺ ला पाठविल्यानंतर सुद्धा त्यांच्यावर ईमान आणण्याऐवजी आपआपल्या धर्मावर कायम राहणे त्या वचनाचे विरूद्ध आहे, जे अल्लाहतआलाने पैगंबराच्या मार्फत प्रत्येक उम्मत कडून घेतले आणि या वचनाला नाकारणे कुफ्र आहे. 'फिस्क ' येथे कुफ्र च्या अर्थात आहे. कारण मोहम्मद ﷺ च्या पैगंबरीचा इनकार करणे फक्त 'फिस्क्' नाही, निव्वळ 'कुफ्र' आहे.

(२) जेव्हा आकाश आणि पृथ्वीतील कोणतीही वस्तू अल्लाहतआलाच्या सामर्थ्य आणि मर्जीच्या बाहेर नाही मग

खुषीने असो किंवा नाखुषीने तर मग तुम्ही त्याच्यासमोर इस्लाम कबूल करण्याला का टाळाटाळ करता? पुढच्या महावाक्यात ईमान आणण्याची पद्धत दाखवून (की प्रत्येक पैगंबरावर आणि प्रत्येक अवतीर्ण झालेल्या पुस्तकावर भेदाभेद केल्याशिवाय ईमान आणणे आवश्यक आहे.) मग सांगण्यात येत आहे की, इस्लामशिवाय आणखी कोणी धर्म कबूल केला जाणार नाही. कोण्या दुसऱ्या धर्माच्या अनुयायांच्या वाट्याला घाट्याशिवाय काहीही येणार नाही.

(३) म्हणजे तमाम खऱ्या पैगंबरांवर ईमान आणणे की, ते आपआपल्या काळात अल्लाहकडून नियुक्त होते तसेच त्यांच्यावर जी पुस्तके आणि सहीफे अवतीर्ण झाली त्यांच्या बाबतीत पण ही श्रद्धा ठेवावी की ते आकाशीग्रंथ होते. जी खरोखरच अल्लाहकडून अवतरीत झाली होती आवश्यक आहे. आणि आता अंमलबजावणी फक्त कुरआन करीमवरच होईल. कारण की, कुरआनाने मागील (सर्व) पुस्तकांना रद्द करून टाकले.

(४) अन्सार मधून एक मुसलमान मुरतद (धर्माकडून फिरून) होऊन गेला आणि मुशरिकांना जाऊन मिळाला पण लवकरच त्याला पश्चात्ताप झाला आणि त्याने लोकांमार्फत रसूल ﷺ पर्यंत संदेश पाठविला की, ''काय माझा पश्चात्ताप मान्य केला जाऊ शकतो? '' यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. या महावाक्यावरून ठाऊक झाले की, मुरतद ची शिक्षा जरी फार कडक आहे कारण की त्याने सत्त्याला ओळखल्यानंतर द्वेष व वंशश्रेष्ठत्व आणि शिरजोरीने सत्याला आक्षेप घेतला. तथापि जर कोणी खुल्या अंत:करणाने पश्चात्ताप आणि आपली सुधारणा करून घेईल; तर अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. त्याचा पश्चात्ताप मान्य करण्यासारखा आहे.

(५) या महावाक्यात त्यांच्या शिक्षेचे वर्णन करण्यात येत आहे. ज्यांना मुर्तद झाल्यानंतर पश्चात्ताप व्यक्त करण्याची सुबुद्धी झाली नाही आणि कुफ्रवर ज्यांचा मृत्यू झाला.

(६) याच्याने ती तौबा (पश्चात्ताप) अभिप्रेत आहे जी मृत्यूच्यावेळी होईल. नाही तर तौबाचा दरवाजा तर प्रत्येकासाठी नेहमी उघडा असतो. याच्यापूर्वीच्या महावाक्यात पण तौबा कबूल होण्याला मान्यता आहे. याशिवाय कुरआनात अल्लाहतआलाने वारंवार तौबाचे महत्त्व आणि त्याला मान्य होण्याचे वर्णन केले आहे.''काय त्यांना ठाऊक नाही की, अल्लाहतआला आपल्या बंद्यांची तौबा मान्य करतो'' (सू.तौबा-१०४) ''तोच आहे जो आपल्या बंद्यांची तौबा कबूल करतो'' (सू. शुरा-२५) आणि हदीसीमध्ये सुद्धा हा विषय मोठ्या स्पष्टीकरणासह वर्णन करण्यात आला आहे. यासाठी या महावाक्याने अभिप्रेत मृत्यूच्या वेळेची तौबा आहे. जी नाकबूल आहे. जसे की कुरआन करीमच्या आणखी एका जागी आहे. ''त्यांची तौबा कबूल नाही जे वाईटपणा करीत रहातात; येथपावेतो की जेव्हा त्यांच्यातून एकाला मृत्यू येऊ लागतो तर म्हणतो माझी तौबा.'' (सू. निसाअ्-१८) हदीसमध्ये सुद्धा आहे., ''अल्लाहतआला बंद्यांची तौबा त्यावेळेपर्यंत कबूल करतो, जोपर्यंत त्याला मृत्यूचा झटका लागत नाही.'' (फत्हुल कदीरच्या हवाल्याने, मुसनद अहमद, तिर्मिझी) म्हणजे जीव जाते वेळची तौबा कबूल नाही.

(७) हदीसमध्ये आले आहे की, ''अल्लाहतआला कयामतच्या दिवशी, एका नर्कात जाणाऱ्याला म्हणेन, जर तुझ्या जवळ दुनियेभरचे सामान असेल तर काय तू, या आगीच्या शिक्षेच्या बदल्यात त्याला देणे पसंत करशील? तो म्हणेल होय! यावर अल्लाहतआला म्हणेन मी जगामध्ये तुझ्याशी याच्यापेक्षा किती तरी सोप्या गोष्टीची मागणी केली होती की, कोणाला माझ्याबरोबर सरकतदार ठरवू नकोस, परंतु तू शिर्कपासून परावृत्त झाला नाहीस.'' (मुसनद अहमद, बुखारी व मुस्लीम, इब्ने कसीर) यावरून ठाऊक झाले की, काफिरासाठी नरकाग्नीची कायमची शिक्षा आहे. त्याने जरी जगामध्ये काही चांगले कामे पण केली असतील तरी ती 'कुफ्र' च्या कारणाने ती पण व्यर्थच जातील. जसे की हदीसमध्ये आहे की, अब्दुल्लाह बिन जदआन च्या बाबतीत विचारण्यात आले की, तो पाहुण्याचा पाहुणचार करणारा, गरीबांची सहायता करणारा आणि गुलामांना स्वतंत्र करणारा होता. काय ही कर्मे त्याला नफा देतील? नबीﷺ नी सांगितले, ''नाही. कारण की, त्याने एक दिवस सुद्धा आपल्या पालनकर्त्याजवळ आपल्या अपराधांची क्षमा मागितली नाही.'' (सहीह मुस्लीम किताबुल ईमान) याचप्रमाणे कोणी मनुष्य तेथे पृथ्वीभर सोने प्राणमूल्य (फिदिया) म्हणून देऊन असे इच्छेल की, तो नरकाग्नीच्या शिक्षेपासून वाचून जावा, तर हे शक्य होणार नाही. प्रथम तर त्या दिवशी कोणाजवळ असेलच काय? आणि जर समजा त्याचे जवळ दुनियाभरचे खजीने असतील, आणि त्यांना देऊन शिक्षेपासून सुटून जाऊ इच्छेल, तर हे पण होणार नाही. कारण यांच्याकडून मोबदला किंवा प्राणमूल्य कबूलच केले जाणार नाही. ज्याप्रमाणे दुसऱ्या जागी सांगितले, ''याच्याकडून काही मोबदला स्वीकारला जाणार नाही आणि न कोणी शिफारस त्याला फायदा पोहचवील'' (सू. बकर-१२३) ''या दिवशी तेथे खरेदी, विक्री होणार नाही, आणि मैत्रीपण कामा येणार नाही.'' (सू. इब्राहीम-३१)

لَنْ تَنَالُوا الْبِرَّ حَتّٰى تُنْفِقُوْا مِمَّا تُحِبُّوْنَ ۚ وَمَا
تُنْفِقُوْا مِنْ شَيْءٍ فَاِنَّ اللّٰهَ بِهٖ عَلِيْمٌ ﴿٩٢﴾

**जोपर्यंत तुम्ही आपल्या आवडत्या वस्तूतून अल्लाहच्या मार्गात खर्च करणार नाही, कधीच भलाईला पावणार नाही[१]. आणि तुम्ही जो पण खर्च कराल, अल्लाहतआला त्याला खूप चांगल्याप्रकारे जाणतो[२] ९२**

كُلُّ الطَّعَامِ كَانَ حِلًّا لِّبَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ اِلَّا مَا حَرَّمَ
اِسْرَآءِيْلُ عَلٰى نَفْسِهٖ مِنْ قَبْلِ اَنْ تُنَزَّلَ التَّوْرٰىةُ ۗ
قُلْ فَاْتُوْا بِالتَّوْرٰىةِ فَاتْلُوْهَآ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿٩٣﴾

**तौरातच्या अवतरणापूर्वी ह.याकूब (अ.) ने ज्या वस्तुला आपल्यावर हराम करून घेतले होते. याशिवाय सर्व खाण्याच्या वस्तू बनी इस्राईलवर हलाल होत्या. आपण सांगून टाका की, जर तुम्ही खरे आहात, तर तौरात घेऊन या आणि वाचून दाखवा[३] ९३**

فَمَنِ افْتَرٰى عَلَى اللّٰهِ الْكَذِبَ مِنْ بَعْدِ ذٰلِكَ
فَاُولٰٓئِكَ هُمُ الظّٰلِمُوْنَ ﴿٩٤﴾

**याच्यानंतर सुद्धा जे लोक अल्लाहतआलावर खोटा आळ घेतील, तेच जालीम आहेत ९४**

قُلْ صَدَقَ اللّٰهُ ۗ فَاتَّبِعُوْا مِلَّةَ اِبْرٰهِيْمَ حَنِيْفًا ۗ
وَمَا كَانَ مِنَ الْمُشْرِكِيْنَ ﴿٩٥﴾

**सांगून टाका की, अल्लाहतआला खरा आहे, तुम्ही इब्राहीम हनीफ (अ.) च्या मिल्लतचे अनुकरण करा, जे मुशरिक नव्हते ९५**

اِنَّ اَوَّلَ بَيْتٍ وُّضِعَ لِلنَّاسِ لَلَّذِيْ بِبَكَّةَ
مُبٰرَكًا وَّ هُدًى لِّلْعٰلَمِيْنَ ﴿٩٦﴾

**अल्लाहतआलाचे पहिले घर, जे लोकांसाठी निश्चित करण्यात आले, तेच आहे जे मक्केत आहे[४]. जे सर्व जगासाठी बरकत आणि हिदायतवाले आहे ९६**

१) 'बिर्र' (पुण्य,भलाई) ने अभिप्रेत येथे चांगले काम किंवा स्वर्ग आहे. (फत्हुल कदीर) हदीसमध्ये येते की, जेव्हा हे महावाक्य अवतीर्ण झाले ह.अबुतलहा अन्सारी ؓ जे मदिनेमध्ये श्रीमंत होते. नबी करीम ﷺ च्या सेवेत उपस्थित झाले आणि विनंती केली की, हे रसूलुल्लाह! ﷺ 'बिरहा' बाग मला सर्वात जास्त प्रिय आहे; मी त्याला अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी दान करतो. रसूल ﷺ नी म्हटले ''ही तर फायदा देणारी माल मत्ता आहे; माझा असा सल्ला आहे की, तुम्ही याला आपल्या नातेवाईकांमध्ये वाटून टाका.'' तात्पर्य आपण ﷺ च्या सल्लामसलतीनंतर त्यांनी त्याला आपले नातेवाईक आणि चुलत्याच्या मुलांमध्ये वाटून टाकले. (मुसनद अहमद) याचप्रमाणे आणखी अनेक सहाबा ؓ नी आपल्या आवडत्या वस्तू अल्लाहच्या मार्गात देऊन टाकल्यात. म्हणजे सर्व आवडत्या वस्तू खर्च करण्याचा आदेश दिला गेला नाही, परंतु आवडत्या वस्तूंमधून काही. यासाठी प्रयत्न असाच झाला पाहिजे की चांगल्या वस्तू दान केल्या जाव्यात. हा उत्तम आणि पूर्ण दर्जा प्राप्त करण्याचा मार्ग (तरीका) आहे. याचा अर्थ असा नाही की, हलक्या प्रतीची वस्तू किंवा आपल्या आवश्यकतेपेक्षा जास्त फालतुक वस्तू किंवा वापरलेली जुनी वस्तू याचा दानधर्म (सदका) केला जाऊ शकत नाही किंवा याचे प्रतिफळ (अज्र) मिळणार नाही. अशा वस्तूंचा दानधर्म करणे पण खचितच् योग्य आणि प्रतिफळ मिळण्यास पात्र आहे; परंतु पूर्णत्वाच्या आणि श्रेष्ठत्वाच्या दृष्टीने आवडती वस्तूच देणे योग्य आहे.

२) तुम्ही जो पण खर्च कराल, चांगली किंवा वाईट वस्तू अल्लाह तिला जाणतो. त्याच्याप्रमाणे अल्लाहतआला प्रतिफळ (जजा) देईल.

३) ही आणि यानंतरची दोन महावाक्ये यहूद्यांच्या या आक्षेपावर अवतीर्ण झाली की, त्यांनी नबी करीम ﷺ ला सांगितले की, आपण इब्राहीम (عليه السلام) च्या धर्माचे अनुकरण करण्याचा दावा करीत आहात आणि उंटाचे मांस पण खात आहात. जेव्हा की, उंटाचे मांस आणि त्याचे दूध इब्राहीम (عليه السلام) च्या धर्मात हराम होते. अल्लाहतआलाने म्हटले, यहूद्यांचा दावा चुकीचा आहे. ह.इब्राहीम (عليه السلام) च्या धर्मात या वस्तू हराम नव्हत्या हां! तथापि काही वस्तू इस्राईल (याकूब (عليه السلام)) नी स्वत: आपल्यावर हराम करून घेतल्या होत्या आणि त्या याच उंटाचे मांस आणि त्याचे दूध होते. (याचे कारण एक नवस किंवा आजार होता) आणि ह.याकूब (عليه السلام) चे हे काम पण तौरात अवतीर्ण होण्याच्या फार पूर्वीचे आहे. यासाठी की, तौरात तर ह.इब्राहीम (عليه السلام) व ह. याकूब (عليه السلام) च्या फार नंतर अवतीर्ण झाले. तर तुम्ही कशाप्रकारे उल्लेखित दावा करू शकतात? शिवाय तौरातमध्ये काही वस्तू तुम्हा (यहूद्यां) वर तुमच्या जुलूम आणि अदवानच्या कारणाने हराम करण्यात आली होती. (सू.अन्आम-१४६, सू.निसाअ-१६०) जर तुम्हाला विश्वास वाटत नसेल, तर तौरात आणा आणि ते वाचून दाखवा. ज्यामुळे ही गोष्ट स्पष्ट होऊन जाईल की, ह.इब्राहीम (عليه السلام) च्या काळात या वस्तू हराम नव्हत्या आणि तुमच्यावर पण काही वस्तू हराम करण्यात आल्या तर त्याचे कारण तुमचा जुलूम व अत्याचार होता. म्हणजे त्यांची मनाई शिक्षा म्हणून होती (अयसरूत्तफासीर)

४) हे यहूद्यांच्या दुसऱ्या आक्षेपाचे उत्तर आहे. ते म्हणत होते की, बैतुल मुकद्दस, सर्वात पहिले उपासनागृह आहे. मोहम्मद ﷺ नी आणि त्यांच्या साथीदारांनी आपला 'किबला' का बदलून घेतला? याच्या उत्तरांत सांगण्यात आले की, तुमचा हा दावा पण चुकीचा आहे. पहिले घर जे अल्लाहच्या उपासनेसाठी बांधण्यात आले आहे, ते आहे जे मक्केत आहे.

فِيهِ اٰيٰتٌۢ بَيِّنٰتٌ مَّقَامُ اِبْرٰهِيْمَ ۚ وَمَنْ دَخَلَهٗ كَانَ اٰمِنًا ؕ وَلِلّٰهِ عَلَى النَّاسِ حِجُّ الْبَيْتِ مَنِ اسْتَطَاعَ اِلَيْهِ سَبِيْلًا ؕ وَمَنْ كَفَرَ فَاِنَّ اللّٰهَ غَنِيٌّ عَنِ الْعٰلَمِيْنَ ﴿٩٧﴾

**ज्यांच्यात स्पष्ट स्पष्ट निशाण्या आहेत. मकामे इब्राहीम आहे. यांच्यात जो येऊन पोहचेल, सुरक्षित होऊन जातो[१]. अल्लाहतआलाने त्या लोकांवर, जे याच्यापर्यंत पोहचण्याची क्षमता बाळगतात, या घराचा 'हज' अनिवार्य (फर्ज) करून दिला आहे[२] आणि जो कोणी याला नाकारेल तर अल्लाहतआला (याच्याकडून, किंबहुना) साऱ्या जगाकडून निरपेक्ष आहे[३]. ९७**

قُلْ يٰۤاَهْلَ الْكِتٰبِ لِمَ تَكْفُرُوْنَ بِاٰيٰتِ اللّٰهِ ۖ وَاللّٰهُ شَهِيْدٌ عَلٰى مَا تَعْمَلُوْنَ ﴿٩٨﴾

**आपण सांगून टाका की, अहो ग्रंथधारी लोकांनो! तुम्ही अल्लाहतआलाच्या महावाक्यांना का नाकारता? जे काही तुम्ही करता, अल्लाहतआला त्यावर साक्षीदार आहे ९८**

قُلْ يٰۤاَهْلَ الْكِتٰبِ لِمَ تَصُدُّوْنَ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ مَنْ اٰمَنَ تَبْغُوْنَهَا عِوَجًا وَّاَنْتُمْ شُهَدَآءُ ؕ وَمَا اللّٰهُ بِغَافِلٍ عَمَّا تَعْمَلُوْنَ ﴿٩٩﴾

**या ग्रंथधारी लोकांना सांगा की, अल्लाहच्या मार्गापासून मोमिनांना का अडवितात? आणि त्यांच्यात दोष काढतात, वास्तविक तुम्ही स्वत: साक्षीदार आहात[४]. अल्लाहतआला तुमच्या कर्माकडून अजाण नाही ९९**

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اِنْ تُطِيْعُوْا فَرِيْقًا مِّنَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ يَرُدُّوْكُمْ بَعْدَ اِيْمَانِكُمْ كٰفِرِيْنَ ﴿١٠٠﴾

**हे ईमानवाल्यांनो! जर तुम्ही ग्रंथधारी लोकांच्या या समूहाच्या गोष्टी मान्य केल्या तर ते तुम्हाला तुमच्या ईमान आणल्यानंतर, धर्माकडून फिरवून (मुरतद) काफिर बनवून टाकतील[५] १००**

وَكَيْفَ تَكْفُرُوْنَ وَاَنْتُمْ تُتْلٰى عَلَيْكُمْ اٰيٰتُ اللّٰهِ وَفِيْكُمْ رَسُوْلُهٗ ؕ وَمَنْ يَّعْتَصِمْ بِاللّٰهِ فَقَدْ هُدِيَ اِلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿١٠١﴾ ع

**(जणू स्पष्ट आहे की,) तुम्ही कसे काय कुफ्र करू शकता? यासाठी की, तुमच्यावर अल्लाहतआलाची महावाक्ये वाचली जातात आणि तुमच्यात रसूलुल्लाह (सल्ल.) उपस्थित आहेत. जो मनुष्य अल्लाहतआलाच्या धर्माला मजबुतीने धरून ठेवील[६], तर नि:संशय त्याला योग्यमार्ग दाखवून देण्यात आला १०१**

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّقُوا اللّٰهَ حَقَّ تُقٰتِهٖ وَلَا تَمُوْتُنَّ اِلَّا وَاَنْتُمْ مُّسْلِمُوْنَ ﴿١٠٢﴾

**हे ईमानवाल्यांनो! अल्लाहतआलाला इतके भ्या, जितका त्याला भिण्याचा हक्क आहे[७] आणि पहा, मरेपर्यंत मुसलमानच रहा १०२**

وَاعْتَصِمُوْا بِحَبْلِ اللّٰهِ جَمِيْعًا وَّلَا تَفَرَّقُوْا ۠ وَاذْكُرُوْا نِعْمَتَ اللّٰهِ عَلَيْكُمْ اِذْ كُنْتُمْ اَعْدَآءً فَاَلَّفَ بَيْنَ قُلُوْبِكُمْ فَاَصْبَحْتُمْ بِنِعْمَتِهٖۤ اِخْوَانًا ۚ وَكُنْتُمْ عَلٰى شَفَا حُفْرَةٍ مِّنَ النَّارِ فَاَنْقَذَكُمْ مِّنْهَا ؕ كَذٰلِكَ يُبَيِّنُ اللّٰهُ لَكُمْ اٰيٰتِهٖ لَعَلَّكُمْ تَهْتَدُوْنَ ﴿١٠٣﴾

**अल्लाहतआलाच्या दोरीला सर्व मिळून मजबूत धरून ठेवा[८] आणि (आपसात) फुट टाकू नका[९] आणि अल्लाहतआलाच्या त्यावेळच्या देणगीला आठवा, जेव्हा तुम्ही एकमेकांचे शत्रू होता, तर त्याने तुमच्या मनांत प्रेम टाकून दिले. मग तुम्ही त्याच्या कृपेने भाऊ भाऊ होऊन गेलांत आणि तुम्ही आगीच्या खड्ड्यापर्यंत पोहचून चुकला होता. तर त्याने तुम्हाला वाचवून घेतले. अशाप्रकारे अल्लाहतआला तुमच्यासाठी आपल्या निशाण्या वर्णन करतो की, तुम्ही (सरळ) मार्गाला पावावे १०३**

१) यांच्यात युद्ध, रक्तपात, शिकार येथपावेतो की वृक्षतोडपण मना आहे. (सहीऐन)

२) ''मार्ग मिळवू शकतील'' चा अर्थ प्रवास खर्च करण्याची क्षमता आणि संपन्नता आहे. म्हणजे इतका खर्च की, प्रवासाचा खर्च पुरा होऊन जाईल. याशिवाय 'इसतताअत' ज्या अन्वार्थामध्ये हे पण येते की, रस्ता शांतीपूर्ण असावा आणि प्राण आणि संपत्ती सुरक्षित रहावी. त्याचप्रमाणे हे पण आवश्यक आहे की, आरोग्य आणि तंदुरूस्ती प्रवासासाठी योग्य असावी. तसेच स्त्रीसाठी महेरीम पण आवश्यक आहे. (फतहुल कदीर) हे महावाक्य प्रत्येक सामर्थ्य राखणाऱ्याला हजच्या अनिवार्यतेसाठी दलील (आधार) आहे. हदीसीमध्ये या गोष्टीचे स्पष्टीकरण होते की, हे हज आयुष्यात फक्त एकदा अनिवार्य (फर्ज) आहे. (तफसीर इब्ने कसीर)

३) सामर्थ्य असून सुद्धा जो हज करणार नाही, त्याच्यासाठी कुरआनने 'कुफ्र' सारखे ठरविले आहे. ज्यामुळे हजच्या अनिवार्य होण्यात आणि त्याच्या ताकीद करण्यात काही शंका राहत नाही. हदीसीमध्ये व सहाबा कराम رضي الله عنهم चे कथन व कर्मां (आसार) मध्ये सुद्धा अशा माणसासाठी कडक शिक्षा करण्याची तंबी (वईद) आलेली आहे. (तफसीर इब्ने कसीर)

४) म्हणजे तुम्ही हे जाणत आहे की, हा धर्म इस्लाम सत्य आहे. याचे आमंत्रण देणारे अल्लाहचे पैगंबर आहेत. कारण

की, या गोष्टी त्या पुस्तकांत आहेत, जी तुमच्या पैगंबरांवर अवतीर्ण झालीत आणि ज्यांना तुम्ही वाचतात.
५) यहूद्यांची चालबाजी आणि त्यांच्याकडून मुसलमानांना मार्गभ्रष्ट करण्याचे सततचे प्रयत्नांचा उल्लेख केल्यानंतर मुसलमानांना तंबी देण्यात येत आहे की, तुम्ही पण त्यांच्या कारस्थानांपासून सावध रहा आणि कुरआनाचे वाचन करणे आणि रसूल ﷺ च्या उपस्थितीत राहून सुद्धा कोठे यहूद्यांच्या जाळ्यात फसू नका, याची पार्श्वभूमी भाष्यकारांच्या रिवायतीत याप्रमाणे वर्णन करण्यात आली आहे की, अन्सारची दोन घराणी 'औस' आणि 'खज़रज' एका बैठकीत बसून आपसांत गप्पा गोष्टी करीत होते की, शास बिन कैस यहूदी त्यांच्याजवळून गेला आणि त्यांचे आपसातील प्रेम बघून त्याला त्याचा हेवा आणि मत्सर वाटला की, पूर्वी हे एक दुसऱ्याचे पक्के शत्रू होते आणि आता इस्लामच्या बरकतीने आपसात दूध व साखरेसारखे होऊन गेले आहेत. त्याने एका तरूणाला ही कामगिरी सोपवली की, त्याने त्यांच्यात जाऊन बुआसच्या लढाईची चर्चा छेडावी. जी हिजरतच्या जरा पूर्वी त्यांच्यात झाली होती. आणि त्यांनी एक दुसऱ्याच्या विरूद्ध टिकात्मक शेर (काव्य प्रकार) म्हटले होते. ते त्यांना ऐकवावे. तात्पर्य त्याने असेच केले. ज्यावर या दोन्ही घराण्यांच्या जुन्या भावना पुन्हा भडकून उठल्या आणि एक दुसऱ्यांना शिवीगाळ करू लागले. येथ पावेतो की शस्त्रे उचलण्याचे आव्हान प्रतिआव्हान सुरू झाले आणि शक्यता होती की, त्यांच्या आपसात युद्ध पण सुरू झाले असते की, इतक्यात नबी ﷺ तेथे आले. आणि त्यांना समजाविले आणि ते लढाईपासून माघारी फिरले.याच्यावर हे महावाक्य पण आणि जे पुढे येत आहे (ते महावाक्य) पण अवतरीत झाले (तफसीर इब्ने कसीर, फत्हुल कदीर वगैरे.)
६) 'इअतसाम बिल्ला' चा अर्थ आहे, अल्लाहच्या धर्माला घट्ट पकडून ठेवणे आणि त्याच्या आज्ञापालनात कुचराई न करणे.
७) याचा अर्थ आहे की, इस्लामचे आदेश आणि अनिवार्य गोष्टींवर पूर्णपणे अंमलबजावणी केली जावी आणि ज्या गोष्टींची मनाई करण्यात आली आहे. त्याच्या जवळपास फिरकले जाऊ नये. काही म्हणतात की, या महावाक्याने सहाबा कराम ﷺ चिंतीत झाले. तेव्हा अल्लाहतआलाने महावाक्य, ''अल्लाहला आपल्या कुवतीनुसार भ्या'' अवतरीत केले. परंतु या महावाक्याला रद्द करणारीच्या ऐवजी, या महावाक्याला ''मुबैय्यिन'' (वर्णन आणि स्पष्टीकरण करणारी) ठरविण्यात यावे तर जास्त बरोबर आहे. कारण की, रद्द तेच मानण्यात यावे जेव्हा दोन्ही महावाक्यात, एकत्र करणे व बरोबर करणे (जमा व ततबीक) शक्य नसेल आणि येथे हे बरोबर करणे शक्य आहे. अर्थ असा होईल की,''अल्लाहतआलाला अशा प्रकारे भ्या, ज्याप्रमाणे आपल्या कुवतीनुसार भिण्याचा हक्क आहे.'' (फत्हुल कदीर)
८) अल्लाहला भिण्यानंतर 'इअतसाम बिहबलिल्लाहि जमीआ'' (सर्व मिळून अल्लाहच्या दोरीला मजबूत धरून घ्यावे.) चा धडा देऊन स्पष्ट करून दिले की, मुक्ती पण याच दोन तत्वांत आहे आणि एकीपण यांच्यावरच कायम होऊ शकते व राहू शकते.
९) ''वलातफर्रकू'' (आणि आपसात फुट टाकू नका) च्या मार्फत फिर्काबंदी पासून मना करण्यात आले. याचा अर्थ असा आहे की, जर उल्लेखित दोन तत्वांना नाकाराल, तर तुमच्यात फुट पडून जाईल आणि तुम्ही वेगवेगळ्या पंथात (फिर्का) विभागले जाल. तात्पर्य फिर्काबंदीचा इतिहास पाहून घ्या. हीच गोष्ट स्पष्ट होऊन पुढे येईल. कुरआन व हदीसच्या समजण्याचे आणि स्पष्ट करून सांगण्यात काही आपसात मतभेद, हे या फिर्काबंदीचे कारण नाही. हा मतभेद तर, सहाबा ﷺ आणि ताबअीन رحمهم الله च्या काळात सुद्धा होता. परंतु मुसलमान फिर्क्यात आणि गटबाजीत विभागले गेले नाहीत. कारण की असा मतभेद असतांना सुद्धा सर्वांचे आज्ञापालन केंद्र व श्रद्धास्थान एकच होते. ते म्हणजे कुरआन आणि रसूल ﷺ ची हदीस. परंतु जेव्हा व्यक्तींच्या नावावर पंथ (मसलक) अस्तित्वात आले, तेव्हा आज्ञापालन आणि श्रद्धेचे हे केंद्र बदलून गेले. आपआपल्या व्यक्ती आणि त्याचे म्हणणे (अकवाल व अफकार) पहिल्या दर्जाचे आणि अल्लाह व रसूल आणि त्यांचे हुकूम दुसऱ्या दर्जाचे ठरविण्यात आले. आणि येथूनच उम्मते मुस्लिमा च्या वेगवेगळ्या होण्यास प्रारंभ झाला. जो दिवसेंदिवस वाढतच गेला आणि फारच मजबूत होऊन गेला. याच्यापेक्षाही मोठी ट्रेजेडी ही आहे की, ही विचारसरणी व चिंतन करण्याची नामुसलमानी आणि नाकारण्याची व मार्गभ्रष्ट करण्याची ही वाकडीवाट इतकी वाढली की, हे बरबादीचे आणि गटागटात विभागण्याचे मूळ आहे. आणि ज्याला कुरआनाने मना केले आहे, त्याला नाऊजोबिल्लाह! 'रहमत' ठरविण्यात येत आहे. आणि त्यासाठी ही खोटी रिवायत पुढे करण्यात येते की, ''माझ्या उम्मतीमधील मतभेद रहमत आहे.'' वास्तविक जर हा मतभेद रहमत असता तर नबी करीम ﷺ नी असे का म्हटले असते की, माझी उम्मत, ७३ फिरक्यांत विभागली जाईल, त्यातून फक्त एक फिर्का स्वर्गात जाईल, बाकी सर्व नरकाग्नीत. आता मुसलमानांचे सर्व फिर्के दावेदार आहेत की, स्वर्गात जाणारा फिर्का हाच आहे, परंतु याची जी ओळख नबी ﷺ नी सांगितली आहे की, तो फिर्का जो माझ्या आणि माझ्या सहाबा ﷺ च्या पद्धतीवर असेन. ''माअना अलैहि व असहाबी'' अहले हदीसच्या शिवाय आणखी कोणी याची ग्वाही देणारा ठरत नाही. कारण की फक्त तेच आहे, ज्यांचे आज्ञापालन केंद्र आणि प्रेम फक्त आणि फक्त अल्लाहचे कुरआन आणि रसूल ﷺ चे फरमान (आदेश) आहे.

وَلۡتَكُنۡ مِّنۡكُمۡ اُمَّةٌ يَّدۡعُوۡنَ اِلَى الۡخَيۡرِ وَيَاۡمُرُوۡنَ
بِالۡمَعۡرُوۡفِ وَيَنۡهَوۡنَ عَنِ الۡمُنۡكَرِ ؕ وَاُولٰٓئِكَ هُمُ الۡمُفۡلِحُوۡنَ ﴿١٠٤﴾

तुमच्यातून एक जमाअत अशी असावयास हवी, जी भलाई (चांगल्या कर्मा) कडे बोलावीन आणि पुण्याची कामे करेन, आणि वाईट कामांपासून मना करील; आणि हेच लोक साफल्य आणि मुक्ती मिळवणारे आहेत (१०४)

وَلَا تَكُوۡنُوۡا كَالَّذِيۡنَ تَفَرَّقُوۡا وَاخۡتَلَفُوۡا مِنۡۢ بَعۡدِ مَا جَآءَهُمُ
الۡبَيِّنٰتُ ؕ وَاُولٰٓئِكَ لَهُمۡ عَذَابٌ عَظِيۡمٌ ﴿١٠٥﴾

तुम्ही त्या लोकांसारखे न होऊन जावे. ज्यांनी आपल्याजवळ ढळढळीत पुरावे आल्यानंतर सुद्धा फुट टाकली आणि मतभेद केला.[1] अशाच लोकांसाठी मोठी शिक्षा आहे (१०५)

يَّوۡمَ تَبۡيَضُّ وُجُوۡهٌ وَّتَسۡوَدُّ وُجُوۡهٌ ۚ فَاَمَّا الَّذِيۡنَ
اسۡوَدَّتۡ وُجُوۡهُهُمۡ ۚ اَكَفَرۡتُمۡ بَعۡدَ اِيۡمَانِكُمۡ
فَذُوۡقُوا الۡعَذَابَ بِمَا كُنۡتُمۡ تَكۡفُرُوۡنَ ﴿١٠٦﴾

ज्या दिवशी काही चेहरे पांढरे शुभ्र असतील, आणि काही काळे कुट्ट[2], काळ्या चेहऱ्यावाल्यांना (सांगितले जाईल) की, काय तुम्ही ईमान आणल्यावर 'कुफ्र' केले? आता आपल्या 'कुफ्र' च्या शिक्षेची मजा चाखा (१०६)

وَاَمَّا الَّذِيۡنَ ابۡيَضَّتۡ وُجُوۡهُهُمۡ فَفِىۡ رَحۡمَةِ اللّٰهِ ؕ
هُمۡ فِيۡهَا خٰلِدُوۡنَ ﴿١٠٧﴾

आणि पांढऱ्याशुभ्र चेहऱ्यावाले अल्लाहतआलाच्या दयेत राहतील व त्यात नेहमी राहतील. (१०७)

تِلۡكَ اٰيٰتُ اللّٰهِ نَتۡلُوۡهَا عَلَيۡكَ بِالۡحَـقِّ ؕ وَمَا اللّٰهُ
يُرِيۡدُ ظُلۡمًا لِّلۡعٰلَمِيۡنَ ﴿١٠٨﴾

हे पैगंबरा! आम्ही तुम्हास सत्य सत्य महावाक्ये वाचून दाखवीत आहोत; आणि अल्लाहतआलाचा इरादा जुलूम करण्याचा नाही (१०८)

وَلِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ ؕ وَاِلَى
اللّٰهِ تُرۡجَعُ الۡاُمُوۡرُ ﴿١٠٩﴾

ع ١١ / ٨

जे काही आकाशात आहे आणि पृथ्वीत आहे, ते सर्व अल्लाह– तआलाचेच आहे आणि अल्लाहतआलाकडेच सर्व कामे परतवली जातात. (१०९)

كُنۡتُمۡ خَيۡرَ اُمَّةٍ اُخۡرِجَتۡ لِلنَّاسِ تَاۡمُرُوۡنَ
بِالۡمَعۡرُوۡفِ وَتَنۡهَوۡنَ عَنِ الۡمُنۡكَرِ وَتُؤۡمِنُوۡنَ بِاللّٰهِ ؕ
وَلَوۡ اٰمَنَ اَهۡلُ الۡكِتٰبِ لَكَانَ خَيۡرًا لَّهُمۡ ؕ مِنۡهُمُ
الۡمُؤۡمِنُوۡنَ وَاَكۡثَرُهُمُ الۡفٰسِقُوۡنَ ﴿١١٠﴾

तुम्ही उत्कृष्ट उम्मत आहात, जी लोकांसाठीच निर्माण केली गेली आहे की, तुम्ही चांगल्या कामांचा आदेश देतात; आणि वाईट कामांपासून मना करतात. आणि अल्लाहतआलावर ईमान ठेवता[3]. जर ग्रंथधारी लोक पण ईमान आणते तर, त्यांच्यासाठी उत्तम होते. त्यांच्यात ईमानवाले पण आहेत[4]; पण बहुतेक लोक आज्ञाभंजक आहेत (११०)

لَنۡ يَّضُرُّوۡكُمۡ اِلَّاۤ اَذًى ؕ وَاِنۡ يُّقَاتِلُوۡكُمۡ يُوَلُّوۡكُمُ
الۡاَدۡبَارَ ۚ ثُمَّ لَا يُنۡصَرُوۡنَ ﴿١١١﴾

हे लोक तुम्हाला सताविण्याशिवाय, आणखी काही जास्त इजा पोहचवू शकत नाही. जर युद्धाचा प्रसंग आला तर पाठ फिरवून घेतील. मग त्यांची कुठलीही मदत केली जाणार नाही[5] (१११)

ضُرِبَتۡ عَلَيۡهِمُ الذِّلَّةُ اَيۡنَ مَا ثُقِفُوۡۤا اِلَّا بِحَبۡلٍ مِّنَ اللّٰهِ وَحَبۡلٍ
مِّنَ النَّاسِ وَبَآءُوۡ بِغَضَبٍ مِّنَ اللّٰهِ وَضُرِبَتۡ
عَلَيۡهِمُ الۡمَسۡكَنَةُ ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمۡ كَانُوۡا يَكۡفُرُوۡنَ
بِاٰيٰتِ اللّٰهِ وَيَقۡتُلُوۡنَ الۡاَنۡۢبِيَآءَ بِغَيۡرِ حَقٍّ ؕ ذٰلِكَ
بِمَا عَصَوۡا وَّكَانُوۡا يَعۡتَدُوۡنَ ﴿١١٢﴾

ते प्रत्येक ठिकाणी फजीत आहेत, ही वेगळी गोष्ट आहे की, अल्लाहतआलाच्या किंवा लोकांच्या आश्रयात असतील[6]. हे अल्लाहच्या प्रकोपास पात्र होऊन गेले आणि त्यांच्यावर दारिद्र्य लादण्यात आले. हे यासाठी की, हे लोक अल्लाहच्या महावाक्यांना नाकारत होते आणि विनाकारण पैगंबरांना ठार करीत होते, हा बदला आहे त्यांच्या आज्ञाभंजनाचा व मर्यादा ओलांडून जाण्याचा[7] (११२)

१) ढळढळीत पुरावे आल्यानंतर फुट पाडली. याच्याने ठाऊक झाले की, यहूदी आणि ख्रिस्त्याचे आपसातील मतभेद आणि फुटीचे कारण हे नव्हते की त्यांना सत्य ठाऊक नव्हते आणि ते याच्या पुराव्यांकडून अजाण होते. किंबहुना सत्य असे आहे की, त्यांनी सर्व काही जाणून बुजून केवळ आपल्या ऐहीक फायद्या आणि आपल्या मनेच्छाच्या गरजेपोटी मतभेद आणि फुटीचा मार्ग पत्करला होता आणि त्यावर अडून बसले होते. कुरआन मजीदने निरनिराळ्या पद्धतीने वारंवार या सत्यतेकडे अंगुली निर्देश केला आहे. आणि यापासून दूर रहाण्याची ताकीद दिली आहे. परंतु खेदजनक आहे की, या उम्मतच्या फुट टाकणाऱ्यांनी ठीक हीच चाल अंगिकारली की, सत्य आणि त्याचे ढळढळीत पुरावे, त्यांना फार चांगल्याप्रकारे ठाऊक आहेत. परंतु ते आपल्या फिर्काबंदिवर अडून आहेत. आणि आपल्या अक्कल व हुशारीची सारी खुबी मागच्या उम्मतीप्रमाणे हेरफेर करण्यात आणि धार्मिक झगड्यात व्यस्त राहून वाया घालवित आहे.

२) ह.इब्ने अब्बास رضي الله عنه नी याच्याने अहले सुन्नत वलजमाअत आणि अहले बिदुआत आणि फुट पाडणारे फिर्के अभिप्रेत धरले आहेत (इब्ने कसीर, फत्हुल कदीर) याच्याने ठाऊक झाले की, इस्लाम तोच आहे, ज्याच्यावर सुन्नत

वलजमाअत वाले अमल करीत आहे. (आणि याचे संपूर्ण मानणारे अहले हदीस आहे.) आणि अहले बिदअत व अहले अिफतराक त्या इस्लामच्या देणगीपासून वंचित आहे. ज्याच्यामुळे मुक्ती मिळणार आहे.

३) या महावाक्यात 'उम्मते मुस्लिमा' ला 'खैरे उम्मत' ठरविण्यात आले आहे आणि याचे कारणपण वर्णन करून देण्यात आले आहे. जे भलाईचा आदेश देणे व वाईट गोष्टीपासून मना करणे आणि अल्लाहवर ईमान आणणे आहे. जणू ही उम्मत जर या फरक करणाऱ्या वैशिष्ट्यांनी सुशोभित असेल तर, 'खैरे उम्मत' आहे. नाहीतर यापेक्षा दुसऱ्या स्थितीत या फरकापासून (इमतियाज) वंचित ठरविली जाईल. याच्यानंतर ग्रंथधारी लोकांच्या खरडपट्टीने सुद्धा या मुद्द्याच्या स्पष्टतेचा उद्देश वाटतो की, जो ''भलाईचा हुकूम करणे आणि वाईट गोष्टींपासून मना करणे'' करणार नाही, तो पण ग्रंथधारी लोकांसारखाच ठरवला जाईल. त्यांचे वैशिष्ट वर्णन करण्यात आले आहे, की, 'ते एक दुसऱ्याला वाईट गोष्टीपासून मना करीत नव्हते'' (सू. अल माइद:-७९) आणि येथे या महावाक्यात त्यांच्या बहुसंख्येला आज्ञाभंजक म्हटले गेले आहे. 'अम्रबिल मअरूफ' हे फर्ज ऐन (खास कर्तव्य) आहे का फर्ज किफायह'? बहुतेक धर्मगुरूंच्या विचारांत हे 'फर्ज किफायह' आहे. म्हणजे उल्मांची (धर्मगुरूंची) जबाबदारी आहे की, त्यांनी हे कर्तव्य निभवत रहावे. कारण मआरूफ आणि मुनकरचे धर्मशास्त्रीय खरे ज्ञान त्यांनाच असते. त्यांच्या दावत व तबलीगच्या फर्ज अदा करण्याने, उम्मतच्या दुसऱ्या लोकांकडून हे फर्ज उतरून जाईन. जसे जिहाद पण सर्व साधारण स्थितीत, फर्ज किफायह' आहे; म्हणून एका समूहाकडून अदा केल्याने, या फर्जची पूर्तता होऊन जाईल.

३) जसे अब्दुल्लाह बिन सलाम ﷺ वगैरे, जे मुसलमान होऊन गेले होते, तथापि त्यांची संख्या फारच थोडी होती.

४) 'अजा' (सताविणे) ने अभिप्रेत तोंडी घेणे व फारच खोटे बोलणे होय, ज्यामुळे मनाला तात्पुरता त्रास होतो तथापि हे तुम्हाला लढाईच्या मैदानात शिकस्त देऊ शकणार नाही. तात्पर्य असेच झाले. मदिनेतून यहूद्यांना निघावे लागले, नंतर खैबरवर विजय मिळाला आणि तेथून पण निघून गेले. त्याचप्रमाणे सीरियाच्या इलाख्यामध्ये ख्रिस्त्यांना मुसलमानांच्या हातून पराभव पत्करावा लागला,त्यामुळे हरूब सलेबियामध्ये (सलेबी युद्ध) ख्रिस्त्यांनी याचा बदला घेण्याचा प्रयत्न केला आणि बैतुल मुकद्दसवर ताबापण मिळविला. परंतु याला सुलतान सलाहुद्दीन अय्युबीने, ९० वर्षांनंतर परत मिळवून घेतले. परंतु आता मुसलमानांच्या ईमानच्या दुर्बलतेच्या परिणामामुळे यहूदी आणि ख्रिस्त्यांच्या एकत्रित कारस्थानांनी आणि प्रयत्नांनी बैतुल मुकद्दस पुन्हा मुसलमानांच्या हातून निघून गेले आहे. तथापि एक वेळ अशी येईल ही सद्यस्थिती बदलून जाईल. विशेषत: ह.ईसा عليه السلام च्या अवतरणानंतर ख्रिस्त्यांचा शेवट आणि इस्लामचे वर्चस्व निश्चित आहे, जसे की, सहीह हदीसीमध्ये आलेले आहे. (इब्ने कसीर)

५) यहूद्यांवर जे अप्रतिष्ठा आणि दारिद्र्य अल्लाहच्या प्रकोपाच्या परिणामांत लादण्यात आले आहे. तात्पुरत्या स्वरूपात त्यांच्यापासून वाचण्याची दोन स्वरूप करण्यात आले आहेत. एक हे की, त्यांनी अल्लाहच्या आश्रयात येऊन जावे, ज्याचा अर्थ असा की, त्यांनी इस्लाम कबूल करून घ्यावा. दुसरे स्वरूप हे आहे की, लोकांचा आश्रय त्यांना प्राप्त होऊन जावा. याचे दोन प्रकार वर्णन करण्यात आले आहे. एक हे की इस्लामी सत्तेशिवाय सर्व साधारण मुसलमानांनी यांना आश्रय द्यावा. जसा की प्रत्येक मुसलमानाला हा अधिकार प्राप्त आहे आणि इस्लामी सत्तेच्या अधिकाऱ्यांना ताकीद देण्यात आली आहे की, त्यांनी मामुली मुसलमानाने दिलेल्या आश्रयाला रद्द करू नये. दुसरे स्वरूप असे की, कोण्या मोठ्या गैरमुस्लीम सत्तेची पाठराखणच त्यांना प्राप्त होऊन जावी. यात मुसलमान आणि गैरमुसलमान दोन्ही सामील आहेत. जसे यहूद्यांची सध्याची सत्ता (इसराईल) अमेरीका,ब्रिटन आणि फ्रान्स वगैरेच्या पाठबळाने अस्तित्वांत आहे. या महाशक्तींनी आपल्या नव्या राष्ट्रांना कायम करण्याच्या उद्देशाने आणि मुसलमानांना नुकसान पोहचविण्याच्या गरजेपोटी या यहूदी सत्तेला अस्तित्वपण प्रदान करते आणि ते सतत यांच्या संरक्षणातपण आहे. याकरीता यहूद्यांच्या या सत्तेच्या कारणाने जे वास्तविक अमेरीका वगैरेच्यामध्ये पूर्वेतील एक लष्करी छावणी आहे. या शंकेचे व गैरसमजुतीचे शिकार न झाले पाहिजे की, हे त्या अप्रतिष्ठीत आणि दारिद्र्याच्या विरूद्ध आहे, जे यांच्या बाबतीत कुरआनात वर्णन करण्यात आले आहे, किंबहुना कुरआनाच्या सत्यतेचा हा तोंडाने सांगितलेला पुरावा, धडा घेण्याच्या दृष्टीकोनातून पाहिला जावा, की ही सत्ता सर्वप्रकारच्या संरक्षणासाठी हत्यारबंद असतांना सुद्धा एका अशा अप्रतिष्ठीत आणि फजिती करणाऱ्या सद्यस्थितीत आहे, जी जगातल्या कुठल्याही समाज आणि राष्ट्राच्या वाट्याला आली नाही. म्हणजे याच्या शक्तीमान आणि शस्त्रास्त्रांनी परिपूर्ण लष्करी तुकड्यांना लहान लहान वयांची मुले अशी दगडे मारतात जसे माकडांना दगड मारला जात असावा. आणि हे यहूदी वर्षानुवर्षे सर्व प्रकारचे सामर्थ्य आणि युक्ती प्रयुक्ती खर्च करून सुद्धा आपल्या या अप्रतिष्ठीत सध्याच्या अवस्थेला बदलण्यात अयशस्वी आहेत. 'खजलहुमुल्लाहु'!

६) हे यांचे कर्तृत्व आहे,ज्याच्या बदल्यांत यांच्यावर फटफजिती लादण्यात आली.

لَيْسُوا سَوَآءً ۭ مِنْ اَهْلِ الْكِتٰبِ اُمَّةٌ قَآئِمَةٌ يَّتْلُوْنَ اٰيٰتِ اللّٰهِ اٰنَآءَ الَّيْلِ وَهُمْ يَسْجُدُوْنَ ﴿١١٣﴾

हे सर्वच्या सर्व एकसारखे नाहीत परंतु या ग्रंथधारी लोकांत एक समूह सत्त्यावर कायम राहणारा सुद्धा आहे. जे रात्रीच्यावेळी सुद्धा अल्लाहच्या पुस्तकाचे वाचन करतात आणि सजदे पण करतात (११३)

يُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ وَيَاْمُرُوْنَ بِالْمَعْرُوْفِ وَيَنْهَوْنَ عَنِ الْمُنْكَرِ وَيُسَارِعُوْنَ فِي الْخَيْرٰتِ ۭ وَاُولٰۗىِٕكَ مِنَ الصّٰلِحِيْنَ ﴿١١٤﴾

हे अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर ईमानपण ठेवतात, भलाईचा हुकूम करतात आणि वाईट कामांपासून मना करतात आणि भलाईच्या कामात घाई करतात. हे पुण्यवान (सदाचरणी) लोकांमधून आहेत (११४)

وَمَا يَفْعَلُوْا مِنْ خَيْرٍ فَلَنْ يُّكْفَرُوْهُ ۭ وَاللّٰهُ عَلِيْمٌۢ بِالْمُتَّقِيْنَ ﴿١١٥﴾

हे जो काही चांगुलपणा करतील, त्याची नाकदरी केली जाणार नाही आणि अल्लाहतआला सदाचरणी लोकांना खूप जाणतो[१] (११५)

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَنْ تُغْنِيَ عَنْھُمْ اَمْوَالُھُمْ وَلَآ اَوْلَادُھُمْ مِّنَ اللّٰهِ شَـيْـــًٔـا ۭ وَاُولٰۗىِٕكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ ھُمْ فِيْھَا خٰلِدُوْنَ ﴿١١٦﴾

काफिरांना त्यांची मालमत्ता आणि संतती अल्लाहजवळ काही कामी येणार नाही हे तर नर्काग्नीत जाणारे आहेत, जे नेहमी त्याच्यातच पडून राहतील (११६)

مَثَلُ مَا يُنْفِقُوْنَ فِيْ ھٰذِهِ الْحَيٰوةِ الدُّنْيَا كَمَثَلِ رِيْحٍ فِيْھَا صِرٌّ اَصَابَتْ حَرْثَ قَوْمٍ ظَلَمُوْٓا اَنْفُسَھُمْ فَاَھْلَكَتْهُ ۭ وَمَا ظَلَمَھُمُ اللّٰهُ وَلٰكِنْ اَنْفُسَھُمْ يَظْلِمُوْنَ ﴿١١٧﴾

हे काफिर लोक जो खर्च वेंच करतील त्यांचे उदाहरण असे आहे की, एक सोसाट्यांचा वारा चालला, ज्यात गारठे होते, जे जालीमांच्या शेतीवरून गेले आणि त्याला नष्ट करून टाकले[२]. अल्लाहतआलाने यांचेवर जुलूम केला नाही, परंतु ते स्वत: आपल्या जिवावर जुलूम करीत होते (११७)

يٰٓاَيُّھَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَتَّخِذُوْا بِطَانَةً مِّنْ دُوْنِكُمْ لَا يَاْلُوْنَكُمْ خَبَالًا ۭ وَدُّوْا مَا عَنِتُّمْ ۚ قَدْ بَدَتِ الْبَغْضَاۗءُ مِنْ اَفْوَاهِھِمْ ښ وَمَا تُخْفِيْ صُدُوْرُھُمْ اَكْبَرُ ۭ قَدْ بَيَّنَّا لَكُمُ الْاٰيٰتِ اِنْ كُنْتُمْ تَعْقِلُوْنَ ﴿١١٨﴾

हे ईमानवाल्यांनो! तुम्ही आपला मित्र ईमान वाल्यांशिवाय दुसऱ्या कोणाला करू नका[३] (तुम्ही पाहत नाही की दुसरे लोक तर) तुम्हाला बर्बाद करण्यात कुठलीही कसर बाकी ठेवीत नाही. ते तर इच्छितात की, तुम्ही दु:खात पडावे[४]. त्यांची दुष्मनी तर स्वत:च्या त्यांच्या तोंडानेपण जाहीर होऊन चुकली आहे आणि जे यांच्या मनात लपविलेले आहे तर ते (यापेक्षासुद्धा) फार जास्त आहे. आम्ही तुमच्यासाठी महावाक्ये वर्णन करून दिली आहेत जर (तुम्ही) बुद्धीमान असाल. (तर यावर विचार करा.) (११८)

ھٰٓاَنْتُمْ اُولَاۗءِ تُحِبُّوْنَھُمْ وَلَا يُحِبُّوْنَكُمْ وَتُؤْمِنُوْنَ بِالْكِتٰبِ كُلِّهٖ ۚ وَاِذَا لَقُوْكُمْ قَالُوْٓا اٰمَنَّا ڮ وَاِذَا خَلَوْا عَضُّوْا عَلَيْكُمُ الْاَنَامِلَ مِنَ الْغَيْظِ ۭ قُلْ مُوْتُوْا بِغَيْظِكُمْ ۭ اِنَّ اللّٰهَ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ﴿١١٩﴾

हा! तुम्ही तर त्यांना चाहतात[५] आणि ते तुमच्याशी प्रेम बाळगत नाही. तुम्ही संपूर्ण पुस्तकाला मानतात (ते मानत नाही, मग प्रेम कसले?) हे तुमच्या समोर तर ईमानच्या आणाभाका (इकरार) घेता, परंतु एकातात क्रोधाने आपली बोटे चावून घेतात[६]; सांगून टाका की, आपल्या रागांतच मरून जा; अल्लाहतआला मनातील लपलेल्या गोष्टींना फार चांगल्याप्रकारे जाणतो (११९)

اِنْ تَمْسَسْكُمْ حَسَنَةٌ تَسُؤْھُمْ ۡ وَاِنْ تُصِبْكُمْ سَيِّئَةٌ يَّفْرَحُوْا بِھَا ۭ وَاِنْ تَصْبِرُوْا وَتَتَّقُوْا لَا يَضُرُّكُمْ كَيْدُھُمْ شَـيْـــًٔـا ۭ اِنَّ اللّٰهَ بِمَا يَعْمَلُوْنَ مُحِيْطٌ ﴿١٢٠﴾

तुमचे बरे झाले तर यांना वाईट वाटते. हाँ! जर वाईट झाले तर (हे) आनंदित होतात[७]. जर तुम्ही सहन केले, आणि सदाचरण (परहेजगारी) आचराल,तर त्यांची चालबाजी,तुमचे काही नुकसान करू शकणार नाही[८]. अल्लाहतआला त्यांच्या कर्मांना घेरून आहे (१२०)

१) म्हणजे सर्व ग्रंथधारी लोक असे नाहीत. ज्यांची निर्भत्सना मागच्या महावाक्यांमध्ये वर्णन करण्यात आली आहे. किंबहुना यांच्यात काही चांगले लोक देखील आहेत, जसे अब्दुल्लाह बिन सलाम, असद बिन उबैद, सअ्लबा बिन साअिया आणि उसैद बिन साअिया वगैरे ज्यांना अल्लाहतआलाने इस्लाम कबूल करण्याची सुबुद्धी दिली. आणि यांच्यात अहेले ईमान आणि ईशभयाचे चांगुलपण (खुबी) आढळून येते. ''रजीअल्लाह् अनहूम् व रजु अनहू.'' 'काएमतून' चा अर्थ आहे, धर्मशास्त्राचे आज्ञापालन आणि नबी करीम ﷺ चे अनुकरण करणारी. 'यसजुदूना' चा अर्थ, रात्री उभे रहातात, म्हणजे तहज्जुद पढतात आणि नमाजीमध्ये कुरआन पढतात. या ठिकाणी अम्र बिल मआरूफ नहय अनिल मुनकर चा अर्थ काहींनी हा केला आहे की, नबी ﷺ वर ईमान आणण्याचा हुकूम देत आणि त्यांचे ﷺ विरुद्ध जाण्याला मना करितात. या समूहाचे वर्णन पुढेपण करण्यात आले आहे. ''खचितच् ग्रंथधारी लोकांतून, काही असे

पण आहेत, जे अल्लाहतआलावर ईमान आणतात, आणि तुमच्यावर जे उतारण्यात आले आहे, आणि त्यांच्याकडे जे अवतरीत झाले आहे. त्याच्यावरपण अल्लाहतआलाला भितात'' (सू. आले इमरान-१९९)

२) कयामतच्या दिवशी काफिरांची संपत्ती त्यांच्या काही कामा येणार नाही आणि संतती सुद्धा. इतकेच काय ते सुधारणा आणि चांगल्या कामांत जो काही खर्च करतात तो पण वाया जाईल आणि यांचे उदाहरण त्या सोसाट्याच्या झंझावातासारखे आहे जो हिरव्यागार शेतीला जाळून मातीमोल करून टाकतो. हे जालीम या शेतीला पाहून आनंदीत होत होते, आणि त्याच्यापासून नफ्याची आशा बाळगून होते की, अचानक त्यांच्या आशा (आकांक्षा) मातीत मिळून जातात. याच्याने ठाऊक झाले की, जोपर्यंत ईमान असणार नाही, सुधारणात्मक कामांवर खर्च करण्याची जगांत कितीही वाहवा होवो, परलोकात यांना याचा काहीच मोबदला मिळणार नाही. तेथे तर त्यांच्यासाठी नरकाग्नीची कायमची शिक्षा आहे.

३) हा विषय पहिलेपण येऊन गेला. तेथे त्याच्या महत्त्वाच्या दृष्टीकोनातून पुन्हा सांगण्यात येत आहे. 'बितानतन' हार्दिक मित्राला आणि भेदीला (राजदार) म्हणण्यात येते. काफिर आणि मुश्‍रिक लोक मुसलमानांच्या बाबतीत जी भावना आणि विचार (अजाइम) बाळगतात, त्यांच्यापैकी ज्यांना ते जाहीर करतात आणि ज्यांना आपल्या मनांत लपवून ठेवतात अल्लाहने त्या सर्वांकडे अंगुली निर्देश केलेला आहे. हे आणि याप्रकारची दुसरी महावाक्ये दृष्टीसमोर ठेवून धर्मपंडीतांनी आणि धर्मशास्त्रींनी विवेचन केले आहे की, एका इस्लामी राज्यांत गैरमुस्लीमांना महत्त्वाच्या हुद्द्यांवर नियुक्त करणे योग्य नाही. असे सांगण्यात येते की, अबु मूसा अशअरी ﷺ नी एका गैरमुस्लीमाला आपला सचिव म्हणून ठेवले. ह.उमर ﷺ च्या लक्षात जेव्हा ही गोष्ट आली, तेव्हा त्यांनी त्यांची कडक शब्दात कानउघाडणी केली आणि सांगितले की, तुम्ही त्यांना जवळ करू नका. जेव्हा अल्लाहने त्यांना दूर केले आहे. त्यांना प्रतिष्ठा देऊ नका, जेव्हा की, अल्लाहने त्यांना अप्रतिष्ठीत केले आहे आणि त्यांना विश्‍वसनीय आणि गुप्त भेद जाणणारे बनवू नका की, अल्लाहने त्यांना लबाडी करणारे आणि खाईन ठरविले आहे. ह.उमर ﷺ नी या महावाक्याचा आधार घेत असे सांगितले. इमाम कुरतुबी رحمة الله عليه म्हणतात, ''सद्यस्थितीत, ग्रंथधारी लोकांना सेक्रेटरी आणि विश्‍वस्त बनविण्यामुळे परिस्थिती बदलून गेली आहे आणि याच कारणाने अपात्रलोक सरदार आणि उमराव बनून गेले आहेत. (तफसीर कुरतुबी). दुर्दैवाने आजच्या इस्लामी राष्ट्रांत देखील कुरआन करीमच्या या फारच महत्त्वाच्या आदेशाला महत्त्व दिले जात नाही आणि याच्या उलट गैरमुस्लीम मोठमोठ्या महत्त्वाच्या हुद्द्यावर आणि भेद असलेल्या जागांवर नियुक्त आहेत. त्यांचे नुकसान पण स्पष्ट झालेले आहे. जर इस्लामी राष्ट्रे आपल्या गृह आणि परराष्ट्र निती मध्ये या हुकूमाची अंमलबजावणी करतील, तर खचितच् पुष्कळश्या नुकसानांपासून सुरक्षित राहू शकतात.

४) 'लायाअलूना' हलगर्जीपणा व कमी करणार नाही. 'खबाला' चा अर्थ फसाद आणि तबाही व बर्बादीचे आहे. 'माआनित्तुम' ज्याच्याने तुम्ही कष्टात व त्रासात पडाल)

५) तुम्ही या दांभिकांची नमाज आणि ईमान जाहीर करण्याने त्यांच्या बाबतीत फसगतीत पडून जातात आणि त्यांच्याशी प्रेम बाळगून लागतात.

६) 'अज्ज यअुज्जु' चा अर्थ दाताने कापण्याचा आहे. हे त्यांचे अतिराग व प्रक्रोपाच्या तिव्रतेचे वर्णन आहे, जसे की पुढील महावाक्य, 'इन तमससकुम्' सुद्धा यांच्या या स्थितीचे प्रकटन आहे.

७) यात दांभिकांच्या त्या तिव्रतर वैराचे वर्णन आहे. जे त्यांना विश्‍वासुंबद्दल होते. आणि ते हे की, जेव्हा मुसलमानांना सुस्थिती प्राप्त होईल, अल्लाहतआलाकडून त्यांना समर्थन व मदत मिळेल आणि मुसलमानांच्या संख्येत आणि सामर्थ्यात वाढ होईल तेव्हा दांभिकांना फार वाईट वाटत असे आणि जर मुसलमान दृष्टकाळांत किंवा दारिद्र्यांत येत किंवा अल्लाहच्या मर्जी व इच्छेने शत्रू तात्पुरत्या स्वरूपात मुसलमानांवर वर्चस्व पावत, (जसे अुहदच्या लढाईत झाले.) तर फार आनंदित व्हायचे. उद्देश हे दाखविण्याने हा आहे की, ज्या लोकांची अशी स्थिती आहे काय ते या लायकीचे आहेत की, मुसलमानांनी त्यांच्या प्रेमासाठी धडपडावे, आणि त्यांना आपले रहस्य जाणणारे आणि मित्र बनवावे? याकरीता अल्लाहतआलाने यहूदी आणि ख्रिस्त्यांशीपण मैत्री ठेवण्यास मना केले आहे. (जसे की, कुरआन करीममध्ये दुसऱ्या ठिकाणांवर आहे.) यासाठी की ते पण मुसलमानांशी तिरस्कार आणि वैर ठेवतात; त्यांच्या यशाने दु:खी आणि त्यांच्या अपयशाने आनंदीत होत असतात.

८) ही त्यांच्या धोका आणि चालबाजीपासून वाचविण्याची पद्धत आणि त्याचा उपाय आहे. जणू दांभिक आणि दुसरे इस्लामचे आणि मुसलमानांचे शत्रुंच्या कारस्थानापासून वाचण्यासाठी सहनशिलता आणि ईशभय (तकवा) फारच आवश्यक आहे. या सहनशिलता आणि ईशभयाच्या कमतरतेने गैरमुस्लिमांच्या कारस्थानांना यशस्वी केले आहे. लोक असे समजता की, काफिरांचे हे यश नैसर्गिक साधन सामुग्री आणि मदतीची विपुलता आणि विज्ञान तंत्रज्ञानात त्यांची प्रगती यांचा परिणाम आहे. वास्तविक खरी वस्तुस्थिती अशी आहे की, मुसलमानांच्या पतन आणि उतरती कळा लागण्याचे मूळ कारण हेच आहे की, ते सहनशिलतेने आपल्या धर्मावर दृढ राहणेपासून वंचित् आणि ईशभयापासून खाली होऊन गेले आहेत. जे मुसलमानांच्या यशाचे कारण, आणि अल्लाहतआलाचे पाठबळ मिळण्याचे साधन आहे.

وَاِذۡ غَدَوۡتَ مِنۡ اَهۡلِكَ تُبَوِّئُ الۡمُؤۡمِنِيۡنَ مَقَاعِدَ لِلۡقِتَالِ ؕ وَاللّٰهُ سَمِيۡعٌ عَلِيۡمٌ ﴿١٢١﴾

हे पैगंबरा! त्या वेळेचेपण स्मरण करा, जेव्हा सकाळी सकाळी तुम्ही आपल्या घरातून निघून मुसलमानांची युद्धाच्या मैदानात लढाईसाठी मोर्चे बांधणी[१] करीत होता. अल्लाहतआला ऐकणारा आणि जाणणारा आहे (१२१)

اِذۡ هَمَّتۡ طَّآئِفَتٰنِ مِنۡكُمۡ اَنۡ تَفۡشَلَا ۙ وَاللّٰهُ وَلِيُّهُمَا ؕ وَعَلَى اللّٰهِ فَلۡيَتَوَكَّلِ الۡمُؤۡمِنُوۡنَ ﴿١٢٢﴾

जेव्हा तुमचे दोन समूह हिंमत खचण्याच्या बेतात होते[२]. अल्लाह त्यांचा मित्र आणि मददगार आहे[३] आणि त्याच्याच पवित्र व्यक्तीमत्त्वावर मोमिनांना भरोसा ठेवला पाहिजे (१२२)

وَلَقَدۡ نَصَرَكُمُ اللّٰهُ بِبَدۡرٍ وَّاَنۡتُمۡ اَذِلَّةٌ ۚ فَاتَّقُوا اللّٰهَ لَعَلَّكُمۡ تَشۡكُرُوۡنَ ﴿١٢٣﴾

बदरच्या लढाईत अल्लाहतआलाने ऐन अशावेळी तुमची मदत केली ज्यावेळी की तुमची काहीच हकीकत नव्हती[४]. म्हणून तुम्ही अल्लाहलाच भ्या. (दुसऱ्या कोणाला नको) कारण की, तुम्हाला आभार प्रदर्शनाची सुबुद्धी व्हावी. (१२३)

اِذۡ تَقُوۡلُ لِلۡمُؤۡمِنِيۡنَ اَلَنۡ يَّكۡفِيَكُمۡ اَنۡ يُّمِدَّكُمۡ رَبُّكُمۡ بِثَلٰثَةِ اٰلٰفٍ مِّنَ الۡمَلٰٓئِكَةِ مُنۡزَلِيۡنَ ﴿١٢٤﴾

जेव्हा आपण मोमिनांचे धाडस बांधवित होता, काय आकाशातून तीन हजार देवदूत उतरून अल्लाहतआलाची तुम्हाला मदत करणे, तुम्हास पुरेसे नाही काय? (१२४)

بَلٰٓى ۙ اِنۡ تَصۡبِرُوۡا وَتَتَّقُوۡا وَيَاۡتُوۡكُمۡ مِّنۡ فَوۡرِهِمۡ هٰذَا يُمۡدِدۡكُمۡ رَبُّكُمۡ بِخَمۡسَةِ اٰلٰفٍ مِّنَ الۡمَلٰٓئِكَةِ مُسَوِّمِيۡنَ ﴿١٢٥﴾

का नाही! परंतु जर तुम्ही धैर्यशील रहाल, आणि सदाचरण आचराल आणि हे लोक याचवेळी तुमच्यावर (चाल) करून येतील तर तुमचा पालनकर्ता तुमची मदत पाच हजार देवदूतांनी करीन[५]. जे निशानवाले असतील[६] (१२५)

وَمَا جَعَلَهُ اللّٰهُ اِلَّا بُشۡرٰى لَكُمۡ وَلِتَطۡمَئِنَّ قُلُوۡبُكُمۡ بِهٖ ؕ وَمَا النَّصۡرُ اِلَّا مِنۡ عِنۡدِ اللّٰهِ الۡعَزِيۡزِ الۡحَكِيۡمِ ﴿١٢٦﴾

आणि हे तर केवळ तुमच्या हार्दिक आनंद व समाधानासाठी आहे. नाही तर मदत तर (फक्त) अल्लाहतआलाकडूनच आहे, जो सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे (१२६)

لِيَقۡطَعَ طَرَفًا مِّنَ الَّذِيۡنَ كَفَرُوۡۤا اَوۡ يَكۡبِتَهُمۡ فَيَنۡقَلِبُوۡا خَآئِبِيۡنَ ﴿١٢٧﴾

(अल्लाहच्या या मदतीचा उद्देश हा होता की, अल्लाहने ) काफिरांच्या एका गटाला कापून टाकावे,किंवा त्यांना फजित करून टाकावे आणि सर्वच्या सर्व निराश होऊन परत जावेत[७] (१२७)

لَيۡسَ لَكَ مِنَ الۡاَمۡرِ شَىۡءٌ اَوۡ يَتُوۡبَ عَلَيۡهِمۡ اَوۡ يُعَذِّبَهُمۡ فَاِنَّهُمۡ ظٰلِمُوۡنَ ﴿١٢٨﴾

हे पैगंबरा! आपल्या अधिकारात काही (ही) नाही[८]. अल्लाहतआला इच्छील तर त्यांचा पश्चात्ताप मान्य करेन[९] किंवा शिक्षा देईन; कारण की, ते जालीम आहेत (१२८)

१) बहुसंख्य भाष्यकारांजवळ याच्याने अभिप्रेत ओहुदच्या लढाईचा तो प्रसंग आहे, जो शव्वाल ३ हिजरीमध्ये घडला. त्याची पार्श्वभूमी थोडक्यात अशी आहे की, जेव्हा २ हिजरीमध्ये बदरच्या लढाईत काफिरांचा धडा घेण्यासारखा पराभव झाला. त्यांची ७० माणसे मारली गेली, आणि ७० कैदी बनले. तर या काफिरांसाठी मोठी बदनामीची सबब आणि बुडून मरण्यासारखी स्थिती होती; म्हणून त्यांनी मुसलमानांच्या विरोधात एक जबरदस्त बदला घेणाऱ्या लढाईची तयारी केली; ज्यात स्त्रियापण शामील झाल्यात. जेव्हा इकडे मुसलमानांना हे ठाऊक झाले की काफिर तीन हजारच्या संख्येत ओहुद पर्वताच्याजवळ तंबू ठोकून स्थीर झाले आहे. तेव्हा नबी ﷺ नी सहाबा ؓ शी विचारविनिमय केला की, त्यांनी मदिनेतच राहून युद्ध करावे, का मदिनेच्या बाहेर पडून मुकाबला करावा? काही सहाबां ؓ नी आंत राहूनच मुकाबला करण्याचा सल्ला दिला; आणि दांभिकांचा सरदार अब्दुल्लाह बिन उबई ने पण याच मताला पाठींबा दिला. परंतु याच्या विरुद्ध काही उत्साही सहाबां ؓ नी ज्यांना बदरच्या लढाईत भाग घेण्याची संधी मिळाली नव्हती; मदिनेच्या बाहेर पडून लढण्याचा पुरस्कार केला. आपण ﷺ खोलीत गेले आणि हत्यारे धारण करून बाहेर आलेत. दुसऱ्या मतवाल्यांना उपरती झाली की, कदाचित आम्ही रसूल ﷺ ना आपल्या इच्छेविरुद्ध बाहेर पडण्याला भाग पाडून बरोबर केले नाही. तात्पर्य ते म्हणाले, ''या रसूलुल्लाह! आपण आंत राहून मुकाबला करणे, पसंत करीत असाल तर आंतच रहा.'' आपण म्हटले की,

युद्धाची वस्त्रे परिधान केल्यानंतर कोण्या पैगंबराला हे योग्य नाही की, त्याने अल्लाहच्या निर्णयाशिवाय परत व्हावे किंवा वस्त्रे उतरवावीत किंबहुना मुसलमान एक हजारच्या संख्येत रवाना झालेत. परंतु सकाळी जेव्हा शूत या ठिकाणी पोहचले, तेव्हा अब्दुल्लाह बिन उबई आपल्या ३०० साथीदारांसह हे सांगून परत आला की, त्याचा सल्ला मान्य करण्यात आला नाही. निष्कारण जीव देण्यात काय अर्थ? त्याच्या या निर्णयाने तात्पुरत्या स्वरूपात काही मुसलमान सुद्धा प्रभावित झाले आणि त्यांनी पण दौर्बल्याचे प्रदर्शन केले (इब्ने कसीर)

२) हे 'औस' आणि 'खजरज' चे दोन कबिले (बनु हारिसा आणि बनु सलमा) होते.

३) याने ठाऊक झाले की, अल्लाहने त्यांची मदत केली आणि त्यांच्या दुर्बलतेला दूर करून त्यांचे धाडस बांधले.

४) संख्याबळाची कमी आणि साहित्याच्या कमीच्या दृष्टीने कारण की बदरच्या लढाईत मुसलमान ३१३ होते आणि तेपण साहित्य व सामानाशिवाय. फक्त दोन घोडे आणि सत्तर उंट होते. बाकी सर्व पायी होते (इब्ने कसीर)

५) मुसलमान बद्रकडे केवळ कुरेश काफल्यावर जो जवळजवळ एकाकी होता, त्यावर छापा मारण्यासाठी निघाले होते; परंतु बद्रला पोहचता,पोहचता ठाऊक झाले की,मक्केहून मुशरिकांचे एक सुसज्ज लष्कर मोठ्या रागांत मोठमोठ्याने गर्जना करीत चाल करून येत आहे. हे ऐकून मुसलमानांमध्ये भीती, परेशानी आणि युद्धाचा आवेग ओसरला, करावे की न करावे या विचारांत ते पडले आणि त्यांनी आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना आणि विनंती केली. यावर अल्लाहतआलाने पहिले एक हजार मग तीन हजार देवदूत उतारण्याची खुषखबर दिली. आणि पुढे वायदा केला की, जर तुम्ही सहनशिलता आणि ईशभयावर कायम राहिलात आणि मुशरिक याच रागाच्या वा क्रोधाच्या अवस्थेत येऊन धडकले तर देवदुतांची ही संख्या पांच हजार करून देण्यात येईल. सांगण्यात येते की, मुशरिकांचा उत्साह आणि क्रोध तसाच राहू शकला नाही (बद्र पोहचण्यापूर्वी पूर्वी त्यांच्यात फुट पडली, एक गट मक्केला परत गेला, आणि बाकी जे बद्रला आले;त्यांच्यातून बहुतेक सरदारांचे मत होते की, युद्ध न केले जावे) याकरिता खुषखबरीप्रमाणे तीन हजार देवदूत उतारण्यांत आले आणि पांच हजारांची संख्या पूर्ण करण्याची पाळी आली नाही.

६) म्हणजे ओळखण्यासाठी त्यांचे खास चिन्ह असेल.

७) हा सामर्थ्यवान व कार्यक्षम अल्लाहच्या मदतीचा परिणाम दाखविण्यात येत आहे. सू.अन्फालमध्ये देवदूतांची संख्या एक हजार दाखविण्यात आली आहे,''जेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे मदतीची याचना करीत होता. अल्लाहतआलाने तुमचे गाऱ्हाणे ऐकूण म्हटले की,मी एक हजार देवदूतांनी तुमची मदत करीन.'' (सू. अन्फाल-९) शब्दावरून माहित होते की, देवदूत तर खरोखर एक हजारच उतरले. आणि मुसलमानांचे साहस आणि समाधान करीता, पहिले तीन हजारचा आणि मग पांच हजारचा आणखी सशर्त वायदा केला गेला. मग परिस्थिती अनुसार मुसलमानांच्या समाधानाच्या दृष्टीकोनातून सुद्धा यांची आवश्यकता भासली नाही. म्हणून काही भाष्यकारांचेजवळ हे तीन हजार किंवा पांच हजार देवदूतांचे अवतरण झाले नाही. कारण उद्देश तर मुसलमानांच्या साहसात वाढ करण्याचा होता. नाहीतर खरा मददतगार तर अल्लाहतआलाच होता. आणि तो आपल्या मदतीसाठी देवदूतांचा किंवा दुसऱ्या कोणांवर अवलंबून नाही. तात्पर्य, त्याने मुसलमानांची मदत केली आणि बद्रच्या लढाईत मुसलमानांना ऐतिहासिक यश मिळाले. 'कुफ्र' ची शक्ती कमजोर झाली आणि काफिरांचा गर्व माती मोल झाला (अयसरूत्तफासीर)

८) म्हणजे या काफिरांना सुबुद्धी देणे, किंवा त्यांच्या बाबतीत कुठल्याही प्रकारचा निर्णय करणे, सर्व अल्लाहच्या अधिकारात आहे. हदीसीमध्ये येते की, ओहुदच्या लढाईत नबी ﷺ चे पवित्र दांत शहीद होऊन गेले आणि मुबारक चेहरा पण जखमी झाला; तेव्हा आपण ﷺ नी सांगितले, ''तो समाज कशाप्रकारे यशस्वी होईल, ज्याने आपल्या पैगंबराला जखमी करून टाकले.'' जणू आपण ﷺ नी त्यांना हिदायत मिळण्यापासून निराशा व्यक्त केली. यावर हे महावाक्य अवतरीत झाले. याप्रमाणे काही रिवायतीमध्ये येते की, आपण ﷺ नी काही काफिरांसाठी 'कुनुतेनाजेला' पण पढली, जिच्यात यांच्यासाठी बद्दुआ केली. तात्पर्य, आपण ﷺ नी बद्दुआ करणे बंद केले. (इब्ने कसीर फत्हुल कदीर) या महावाक्याने त्या लोकांनी धडा घेतला पाहिजे, जे नबी ﷺ ला सर्व काही करू शकण्याला समर्थ समजतात की, आपल्याला ﷺ एवढा अधिकारपण नव्हता की, कोणाला हिदायतच्या मार्गाला लावून द्यावे; वास्तविक आपण ﷺ याच मार्गाकडे बोलाविण्याकरीता पाठविले गेले होते.

९) ही घराणी ज्यांच्यासाठी बद्दुआ करीत होते, अल्लाहच्या सुबुद्धी देण्याने, सर्व मुसलमान होऊन गेले. ज्याने ठाऊक झाले सर्व गोष्टी अल्लाहतआलाच्या अखत्यारांत आहे. आणि अदृष्टाचा ज्ञाता फक्त अल्लाहतआलाच आहे.

وَلِلّٰهِ مَا فِی السَّمٰوٰتِ وَمَا فِی الۡاَرۡضِ ؕ یَغۡفِرُ لِمَنۡ
یَّشَآءُ وَیُعَذِّبُ مَنۡ یَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ غَفُوۡرٌ رَّحِیۡمٌ ﴿۱۲۹﴾ ع ١٣ ٩ ٤

**आणि आकाशांत आणि पृथ्वीत जे काही आहे, सर्व अल्लाहचेच आहे.**
**(ع १३ ९ ४) तो ज्याला इच्छेल त्याला माफ करेल आणि ज्याला इच्छेल त्याला**
**शिक्षा करेल. अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे (१२९)**

یٰۤاَیُّهَا الَّذِیۡنَ اٰمَنُوۡا لَا تَاۡكُلُوا الرِّبٰۤوا اَضۡعَافًا
مُّضٰعَفَةً ۪ وَّاتَّقُوا اللّٰهَ لَعَلَّكُمۡ تُفۡلِحُوۡنَ ﴿۱۳۰﴾ۚ

**हे ईमानवाल्यांनो! वाढवून चढवून व्याज (म्हणजे चक्रवाढ व्याज) खाऊ नका[१]. अल्लाहतआलाला भ्या की तुम्हास मुक्ती मिळावी (१३०)**

وَاتَّقُوا النَّارَ الَّتِیۡۤ اُعِدَّتۡ لِلۡكٰفِرِیۡنَ ﴿۱۳۱﴾ۚ

**आणि त्या अग्नीला भ्या; जी काफिरांसाठी तयार करण्यात आली आहे (१३१)**

وَاَطِیۡعُوا اللّٰهَ وَالرَّسُوۡلَ لَعَلَّكُمۡ تُرۡحَمُوۡنَ ﴿۱۳۲﴾ۚ

**आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करा; कारण की, तुमच्यावर दया केली जावी (१३२)**

وَسَارِعُوۡۤا اِلٰی مَغۡفِرَةٍ مِّنۡ رَّبِّكُمۡ وَجَنَّةٍ عَرۡضُهَا
السَّمٰوٰتُ وَالۡاَرۡضُ ۙ اُعِدَّتۡ لِلۡمُتَّقِیۡنَ ﴿۱۳۳﴾ۙ

**आणि आपल्या पालनकर्त्याच्या माफीकडे आणि त्या स्वर्गाकडे धावा. ज्याचा[२] विस्तार आकाश व पृथ्वीच्या बरोबर आहे; जो सदाचरणी लोकांसाठी, तयार केला गेला आहे (१३३)**

الَّذِیۡنَ یُنۡفِقُوۡنَ فِی السَّرَّآءِ وَالضَّرَّآءِ وَالۡكٰظِمِیۡنَ
الۡغَیۡظَ وَالۡعَافِیۡنَ عَنِ النَّاسِ ؕ وَاللّٰهُ یُحِبُّ الۡمُحۡسِنِیۡنَ ﴿۱۳۴﴾ۚ

**जे लोक सुख आणि दु:ख दोन्ही स्थितीत अल्लाहच्या मार्गात खर्च करतात[३], राग गिळून टाकणारे आणि क्षमा करणारे आहेत[४]; अल्लाहतआला अशा सदाचरणी लोकांशी प्रेम करतो (१३४)**

وَالَّذِیۡنَ اِذَا فَعَلُوۡا فَاحِشَةً اَوۡ ظَلَمُوۡۤا اَنۡفُسَهُمۡ ذَكَرُوا
اللّٰهَ فَاسۡتَغۡفَرُوۡا لِذُنُوۡبِهِمۡ ۪ وَمَنۡ یَّغۡفِرُ
الذُّنُوۡبَ اِلَّا اللّٰهُ ۪۟ وَلَمۡ یُصِرُّوۡا عَلٰی مَا فَعَلُوۡا
وَهُمۡ یَعۡلَمُوۡنَ ﴿۱۳۵﴾

**जेव्हा यांच्याकडून एखादे निर्लज्ज काम होऊन जाते, किंवा एखादे पाप करून बसतील; तर ताबडतोब अल्लाहचे स्मरण आणि आपल्या पापांसाठी क्षमायाचना करू लागतात[५]. अल्लाह– तआलाशिवाय आणखी कोणी पापांना माफ करू शकेल? आणि ते लोक ज्ञान असून सुद्धा कोण्या वाईट कामांवर अडून बसत नाही (१३५)**

१) कारण की, ओहुदच्या लढाईत अपयश, पैगंबराचे आज्ञाभंजन व ऐहिक संपत्तीच्या मोहाच्या कारणाने आले होते, म्हणून आता ऐहीक मोह,जगातला सर्वांत भयानक स्वरूप व्याजाला मना करण्यांत येत आहे आणि आज्ञापालन करण्याची ताकीद केली जात आहे. आणि वाढवून आणि चढवून (म्हणजे चक्रवाढ) व्याज खाऊ नका, चा अर्थ नाही की, वाढवून चढवून नसेल तर सरळ व्याज जाएज आहे; किंबहुना व्याज कमी असो अथवा जास्त, चक्रवाढ व्याज असो किंवा सरळ व्याज, एकदम हराम आहे. म्हणजे व्याजाचे त्यावेळी जे स्वरूप होते त्याचे वर्णन आणि प्रकटन आहे. अज्ञान काळात व्याजाची ही पद्धत सर्वसामान्य होती की, जेव्हा अदा करण्याची वेळ येऊन ठेपत असे आणि अदा करणे शक्य नसे; तेव्हा मुदतवाढीच्या बरोबरच व्याजामध्ये वाढ होऊन जात असे. त्यामुळे थोडीशी रक्कमपण वाढून वाढून कुठल्याकुठे पोहचून जात असे. आणि सर्वसामान्य माणसाला याचे अदा करणे अशक्य होऊन जात असे. अल्लाहतआलाने म्हटले, अल्लाहतआलाला भ्या. आणि त्या आगीला भ्या; जी काफिरांसाठी तयार करण्यात आली आहे. ज्याने या तंबीचापण उद्देश आहे की, व्याज खाण्यापासून परावृत्त न व्हाल, तर हे हराम कृत्य तुम्हास 'कुफ्र' पर्यंत पोहचवू शकते कारण की, हे अल्लाह व रसूलशी युद्ध करणे आहे.

२) माल व ऐहिक संपत्तीच्या मागे लागून परलोक नष्ट करण्याऐवजी अल्लाह व रसूलच्या आज्ञापालनात आणि अल्लाहच्या क्षमेचा आणि त्याच्या स्वर्गाचा मार्ग चोखाळा; जो सदाचरणी लोकांसाठी अल्लाहने तयार केला आहे. म्हणून पुढे सदाचरणी लोकांची काही वैशिष्टये वर्णन करण्यात आली आहेत.

३) म्हणजे निव्वळ सुबत्तेतच नाही तर तंगदस्तीच्या प्रसंगी सुद्धा अल्लाहच्या मार्गात खर्च करतात. अर्थ असा की, प्रत्येक अवस्थेत, आणि प्रत्येक वेळी, अल्लाहच्या मार्गात खर्च करतात.

४) म्हणजे जेव्हा क्रोध,त्यांना उत्तेजीत करतो, तर त्याला गिळून टाकतात. म्हणजे त्यावर अंमलबजावणी करीत नाही आणि त्यांना माफ करून टाकतात; जे यांच्याशी वाईट वर्तन करतात.

५) म्हणजे जेव्हा त्यांचेकडून, मानवी प्रकृतीनुसार एखादी चूक किंवा पातक होऊन जाते, तर लगेच पश्चात्ताप व्यक्त करतात आणि क्षमायाचना करतात.

أُولَٰئِكَ جَزَاؤُهُم مَّغْفِرَةٌ مِّن رَّبِّهِمْ وَجَنَّاتٌ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ خَالِدِينَ فِيهَا ۚ وَنِعْمَ أَجْرُ الْعَامِلِينَ ﴿١٣٦﴾

त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमा आहे आणि स्वर्ग आहेत, ज्यांच्याखालून पाट वहात आहे, ज्यांत ते नेहमी राहतील. या चांगले काम करण्याऱ्यांचे किती बरे हे प्रतिफळ (१३६)

قَدْ خَلَتْ مِن قَبْلِكُمْ سُنَنٌ فَسِيرُوا فِي الْأَرْضِ فَانظُرُوا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُكَذِّبِينَ ﴿١٣٧﴾

तुमच्या पूर्वीही अशा घटना घडून चुकल्या आहेत; तर पृथ्वीत चालून फिरून पाहून घ्या की (आकाशी शिकवणीला) खोटे ठरवणाऱ्यांचा काय परिणाम झाला[१]? (१३७)

هَٰذَا بَيَانٌ لِّلنَّاسِ وَهُدًى وَمَوْعِظَةٌ لِّلْمُتَّقِينَ ﴿١٣٨﴾

सर्व सामान्य लोकांसाठी तर हे कुरआन बयान (प्रवचन) आहे. आणि सदाचारी लोकांसाठी मागदर्शन आणि उपदेश आहे (१३८)

وَلَا تَهِنُوا وَلَا تَحْزَنُوا وَأَنتُمُ الْأَعْلَوْنَ إِن كُنتُم مُّؤْمِنِينَ ﴿١٣٩﴾

तुम्ही आळशी होऊ नका आणि दु:खीही होऊ नका; तुम्हीच वरचढ रहाल, जर तुम्ही ईमानवाले आहात[२] (१३९)

إِن يَمْسَسْكُمْ قَرْحٌ فَقَدْ مَسَّ الْقَوْمَ قَرْحٌ مِّثْلُهُ ۚ وَتِلْكَ الْأَيَّامُ نُدَاوِلُهَا بَيْنَ النَّاسِ وَلِيَعْلَمَ اللَّهُ الَّذِينَ آمَنُوا وَيَتَّخِذَ مِنكُمْ شُهَدَاءَ ۗ وَاللَّهُ لَا يُحِبُّ الظَّالِمِينَ ﴿١٤٠﴾

जर तुम्ही जखमी झाला आहात तर तुमचे विरोधक लोक सुद्धा असेच जखमी झालेले आहेत; आम्ही या दिवसात लोकांना अदलबदल करीत असतो[३] (उहुदचा पराजय) यासाठी होता की, अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना ओळखून घ्यावे आणि तुमच्यातून काहींना हौतात्म्य प्रदान करावे. आणि अल्लाहतआला जालीम लोकांशी प्रेम करत नाही. (१४०)

१) ओहुदच्या लढाईत, मुसलमानांचे लष्कर सातशे व्यक्तींनी परिपूर्ण होते. त्यातून पन्नास जणांची धनुष्य बाण वाल्यांची एक तुकडी आपण ﷺ नी अब्दुल्लाह बिन जुबैरच्या मार्गदर्शनाखाली एका डोंगरावर स्थानापन्न करून दिली. आणि त्यांना ताकीद करून दिली की, आमचा विजय होवो किंवा हार होवो, तुम्ही या जागेवरून हलायचे नाही. आणि तुमचे काम असे आहे की, घोडेस्वार तुमच्याकडे आले की, बाणांनी त्यांना मागे ढकलून देणे. परंतु मुसलमान जेव्हा विजयी होऊन गेले आणि माल आणि सामान गोळा करू लागले, तेव्हा या तुकडीत मतभेद निर्माण झाला. काही लोक म्हणू लागले की, नबी ﷺ च्या आज्ञेचा उद्देश तर हा होता की, जोपर्यंत युद्ध चालू आहे, येथेच जमून रहाणे. परंतु जेव्हा हे युद्ध संपलेले आहे. आणि काफिर पळ काढीत आहेत. तर येथे रहाणे आवश्यक नाही. तात्पर्य त्यांनी पण तेथून हटून माल आणि सामान गोळा करावयास सुरवात केली. आणि तेथे नबी ﷺ च्या आज्ञापालनांत फक्त दहा माणसे बाकी राहिलीत. ज्यामुळे काफिरांनी याचा फायदा उचलला. आणि त्यांचे घोडेस्वार पलटून तेथूनच मुसलमानांच्या पाठीमागे जाऊन पोहचले आणि त्यांच्यावर अचानक हल्ला करून दिला, ज्यामुळे मुसलमानांमध्ये सावळा गोंधळ माजला आणि ते अनपेक्षित फारच भयभीत होऊन गेले. परिणाम हा झाला की, सत्तर मुसलमान शहीद आणि पुष्कळशे जखमी होऊन गेले. ज्यामुळे मुसलमानांना साहजिकच फार त्रास झाला. या महावाक्यांत, अल्लाहतआला मुसलमानांचे सांत्वन करीत आहे; की तुमच्याशी जे काही घडले आहे ही काही नवी गोष्ट नाही पूर्वी सुद्धा असे होत आले आहे. तथापि शेवटी तबाही आणि बर्बादी अल्लाह व रसूलला खोटे ठरविणाऱ्यांचेच भाग्य राहिले आहे.

२) मागच्या लढाईत तुमचे जे नुकसान झाले आहे, त्यावर उदास होऊ नका आणि त्यावर दु:ख करू नका, कारण की, जर तुमच्यात ईमानी सामर्थ्य बाकी राहिले तर वरचढ आणि विजयी तुम्हीच रहाल. यांत, अल्लाहतआलाने ईमानवाल्यांच्या सामर्थ्याचे मूळ रहस्य, आणि त्यांच्या यशाचा पाया स्पष्ट करून दिला आहे. म्हणून खरोखरच असे घडले की, यांच्यानंतर मुसलमान प्रत्येक संघर्षाच्यावेळी विजयी राहिले.

३) आणखी एका वेगळ्या प्रकारे मुसलमानांचे सांत्वन केले जात आहे की, जर ओहुदच्या लढाईत तुमचे काही लोक जखमी झाले तर काय झाले? तुमचे विरोधक सुद्धा बदरच्या युद्धात आणि ओहुदच्या सुरवातीला, अशाच प्रकारे जखमी झालेले आहेत. आणि अल्लाहतआलाच्या युक्ती प्रयुक्तीची इच्छा आहे की, तो हारजितीचे दिवस बदल सदल करीत रहातो. कधी जेत्याला पराजीत तर कधी पराजिताला जेता बनवून टाकतो.

وَلِيُمَحِّصَ اللّٰهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَيَمْحَقَ الْكٰفِرِيْنَ ﴿١٤١﴾

**(हे कारण पण होते) की, अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना बिलकुल वेगळे करून द्यावे आणि काफिरांना मिटून टाकावे[१] ﴿१४१﴾**

اَمْ حَسِبْتُمْ اَنْ تَدْخُلُوا الْجَنَّةَ وَلَمَّا يَعْلَمِ اللّٰهُ الَّذِيْنَ جٰهَدُوْا مِنْكُمْ وَيَعْلَمَ الصّٰبِرِيْنَ ﴿١٤٢﴾

**काय तुम्ही असे समजून चालला आहात की, तुम्ही स्वर्गात चालले जाल[२]? वास्तविक आतापर्यंत अल्लाहतआलाने हे जाणून घेतले नाही की,तुमच्यात जिहाद करणारे कोण आहेत, आणि सहनशिलता धारण करणारे कोण आहेत[३]? ﴿१४२﴾**

وَلَقَدْ كُنْتُمْ تَمَنَّوْنَ الْمَوْتَ مِنْ قَبْلِ اَنْ تَلْقَوْهُ فَقَدْ رَاَيْتُمُوْهُ وَاَنْتُمْ تَنْظُرُوْنَ ﴿١٤٣﴾

**युद्धापूर्वी तर तुम्ही, हौतात्म्याचे (शहादत) इच्छुक होता[४]. आता त्याला आपल्या डोळ्यांनी आपल्या समोर पाहून घेतले[५] ﴿१४३﴾**

(१) ओहुदमध्ये मुसलमानांचा तात्कालीक पराभव पुष्कळशा त्यांच्या हलगर्जीपणामुळे झाला. यांतही भविष्य काळाकरीता युक्त्या प्रयुक्त्या लपलेल्या होत्या. ज्यांना अल्लाहतआला पुढे वर्णन करीत आहे. एक ही की, अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना जाणून घ्यावे. (कारण की, सहनशिलता आणि दृढ जमून रहाणे, ईमानची मागणी आहे.) युद्धाच्या तिव्रतेत आणि संकटात ज्यांनी सहनशिलता आणि दृढ जमून रहाण्याचे प्रदर्शन केले, खचितच् ते सर्व विश्वासू आहेत. दुसरे असे की, काही लोकांना हौतात्म्याचे पदावर आरूढ करून द्यावे. तिसरे असे की, ईमानवाल्यांना त्यांच्या गुन्ह्यांपासून पाकसाफ करून टाकावे, 'तमहीस' चा एक अर्थ निवड करून घेण्याचा आहे. एक अर्थ पावित्र्य, आणि एक अर्थ मुक्तता चे केले गेले आहे. शेवटी दोघांचा अर्थ गुन्ह्यांपासून पाकी आणि मुक्तता आहे. (फत्हुल कदीर) मरहूम भाषांतरकाराने पहिल्या अर्थाला अंगिकारले आहे. चौथे असे की, काफिरांना नष्ट करून टाकावे. ते असे की, तात्कालीकयशाने त्यांच्या शिरजोरपणांत आणि गर्वांत वाढ होईल आणि हीच गोष्ट त्यांच्या बरबादीला कारणीभूत होईल.

(२) म्हणजे युद्ध आणि हालअपेष्टाच्या परीक्षेशिवाय तुम्ही स्वर्गात चालले जाल? नाही; परंतु स्वर्ग त्या लोकांना मिळेल जे परीक्षेत पूर्णपणे उत्तीर्ण होतील. जसे दुसऱ्या जागी सांगितले, ''काय तुम्ही अशी अपेक्षा करतात की तुम्ही स्वर्गात चालले जाल? आणि आता तुमच्यावर ती स्थिती आली नाही; जी तुमच्या पूर्वीच्या लोकांवर आली होती,त्यांना टंचाई आणि कष्ट पोहचले, आणि ते खूप झटकारलेही गेले.'' (सू. बकर:-२१४) आणखी पुढे सांगितले, ''काय लोक अशी अपेक्षा करतात की, त्यांना फक्त हे सांगण्यावर सोडून दिले जाईल, की, 'आम्ही ईमान आणले' आणि त्यांची कसोटी न घेतली जावी?'' (सू. अन्कबूत-२)

(३) हा विषय याच्यापूर्वी सू.बकर: मध्ये येऊन चुकला आहे. येथे प्रसंगानुसार पुन्हा वर्णन करण्यात येत आहे की, स्वर्ग असाच मिळून जाणार नाही. त्यासाठी तुम्हाला प्रथम कष्टाच्या आणि संकटाच्या भट्टीतून जावे लागेल. धर्मयुद्धाच्या मैदानावर तुम्हाला आजमाविले जाईल. तेथे रणधुमाळीत घेरले जाऊन तुम्ही जीवावर बाजी लावून सहनशिल आणि दृढ जमून रहाण्याचे प्रदर्शन करता किंवा नाही?

(४) हा इशारा त्या सहाबा ﷺ कडे आहे, जे बद्रच्या युद्धात शामील न झाल्यामुळे निराशेची भावना बाळगत होते आणि अशी इच्छा करीत होते की, जर युद्धाचे मैदान तापले तर ते सुद्धा काफिरांचे मस्तक ठेचून जिहादचे श्रेष्ठत्व मिळवतील. याच सहाबा ﷺ नी ओहुदच्या लढाईत युद्धज्वराने प्रेरीत होऊन, मदीनेच्या बाहेर पडण्याचा सल्ला दिला होता. परंतु जेव्हा मुसलमानांचा विजय काफिरांच्या अचानक हल्ल्याने पराभवांत बदलून गेला, (याचा खुलासा पुर्वी येऊन चुकला) तर हे उत्साहाने परिपूर्ण लढवय्ये सुद्धा निराश झाले आणि काहींनी तर पळ काढला (जसे की पुढे तपशील येईल.) आणि फारच थोडे लोक दृढ जमून राहिले (फत्हूल कदीर) याच करीता हदीसमध्ये येते की, ''तुम्ही शत्रुशी आमना सामना करण्याची आकांक्षा करू नका आणि अल्लाहजवळ सुरक्षितता मागत जा. तथापि स्वत:हून परिस्थिती अशी होऊन जाईल की, तुम्हाला शत्रुशी लढावेच लागेल, तर मग दृढ जमून रहा. आणि हे लक्षात असू द्या की,स्वर्ग तलवारींच्या छायेखाली आहे.'' (सहीऐन इब्ने कसीरच्या हवाल्याने)

(५) 'रऐतुमुहू' आणि 'तनजुरून' दोघांचा एकच अर्थ म्हणजे पहाण्याचा आहे. ताकीद आणि स्पष्ट करण्यासाठी दोन शब्द वापरण्यात आले आहेत. म्हणजे तलवारींची चमक, भाल्यांची तेजी, बाणांचा वर्षाव आणि प्राणांची बाजी लावणाऱ्यांच्या रांगाच्या रांगामध्ये तुम्ही मृत्यूचा साक्षात अनुभव घेऊन पाहिला. (इब्ने कसीर व फत्हुल कदीर)

وَ مَا مُحَمَّدٌ اِلَّا رَسُوۡلٌ ۚ قَدۡ خَلَتۡ مِنۡ قَبۡلِهِ الرُّسُلُ ؕ اَفَا۠ئِنۡ مَّاتَ اَوۡ قُتِلَ انۡقَلَبۡتُمۡ عَلٰۤى اَعۡقَابِكُمۡ ؕ وَ مَنۡ يَّنۡقَلِبۡ عَلٰى عَقِبَيۡهِ فَلَنۡ يَّضُرَّ اللّٰهَ شَيۡـئًا ؕ وَ سَيَجۡزِى اللّٰهُ الشّٰكِرِيۡنَ ﴿۱۴۴﴾

मोहम्मद (सल्ल.) फक्त रसूलच तर आहेत[१]. यांच्यापूर्वीही बरेच पैगंबर होऊन चुकले आहेत. काय जर त्यांचा मृत्यू झाला; किंवा ते शहीद (हुतात्मा) होऊन गेलेत, तर तुम्ही इस्लामपासून उलट पावलांनी फिरून जाणार? आणि जो कोणी आपल्या टांचावर फिरून जाईल, तर अल्लाहतआलाचे काहीच बिघडवणार नाही[२]. लवकरच अल्लाहतआला आभार व्यक्त करणाऱ्यांना उत्तम मोबदला देईल[३] (१४४)

وَمَا كَانَ لِنَفۡسٍ اَنۡ تَمُوۡتَ اِلَّا بِاِذۡنِ اللّٰهِ كِتٰبًا مُّؤَجَّلًا ؕ وَمَنۡ يُّرِدۡ ثَوَابَ الدُّنۡيَا نُؤۡتِهٖ مِنۡهَا ۚ وَمَنۡ يُّرِدۡ ثَوَابَ الۡاٰخِرَةِ نُؤۡتِهٖ مِنۡهَا ؕ وَسَنَجۡزِى الشّٰكِرِيۡنَ ﴿۱۴۵﴾

अल्लाहतआलाच्या हुकूमाशिवाय कोणीही जीवधारी मरू शकत नाही; निश्चित केलेली वेळ लिहिलेली आहे. दुनियाच्या इच्छुकांना आम्ही काही दुनिया देऊन टाकतो आणि परलोकाचे प्रतिफळ इच्छिणाऱ्यांना आम्ही ते सुद्धा देऊ[४] आणि उपकार मानणाऱ्यांना आम्ही लवकरच चांगला बदला देऊ (१४५)

وَ كَاَيِّنۡ مِّنۡ نَّبِىٍّ قٰتَلَ ۙ مَعَهٗ رِبِّيُّوۡنَ كَثِيۡرٌ ۚ فَمَا وَهَنُوۡا لِمَاۤ اَصَابَهُمۡ فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ وَمَا ضَعُفُوۡا وَمَا اسۡتَكَانُوۡا ؕ وَاللّٰهُ يُحِبُّ الصّٰبِرِيۡنَ ﴿۱۴۶﴾

पुष्कळशा पैगंबरासोबत राहून पुष्पळशे अल्लाहवाले जिहाद करून चुकले आहेत. त्यांनापण अल्लाहच्या मार्गात कष्ट पोहचले, परंतु ते हिम्मत हारले नाहीत आणि उदासपण झाले नाहीत आणि माघारपण घेतली नाही. आणि अल्लाह धैर्यशील (सहनशील) लोकांशीच प्रेम करतो[५] (१४६)

وَمَا كَانَ قَوۡلَهُمۡ اِلَّاۤ اَنۡ قَالُوۡا رَبَّنَا اغۡفِرۡ لَنَا ذُنُوۡبَنَا وَ اِسۡرَافَنَا فِىۡۤ اَمۡرِنَا وَثَبِّتۡ اَقۡدَامَنَا وَ انۡصُرۡنَا عَلَى الۡقَوۡمِ الۡكٰفِرِيۡنَ ﴿۱۴۷﴾

ते हेच म्हणत राहिले की, हे (आमच्या) पालनकर्त्या! आमच्या अपराधांची क्षमा कर आणि आमच्याकडून आमच्या कामांत झालेल्या फाजीलपणाची क्षमा कर आणि (शत्रुंच्या मुकाबल्यात) आमचे पाय दृढ जमवून ठेव आणि आमची काफिर लोकांवर मदत कर (१४७)

فَاٰتٰٮهُمُ اللّٰهُ ثَوَابَ الدُّنۡيَا وَحُسۡنَ ثَوَابِ الۡاٰخِرَةِ ؕ وَ اللّٰهُ يُحِبُّ الۡمُحۡسِنِيۡنَ ﴿۱۴۸﴾

अल्लाहतआलाने त्यांना या जगात पण मोबदला दिला आणि परलोकांत चांगला मोबदला दिला. आणि अल्लाहतआला नेक लोकांशी प्रेम करतो (१४८)

१) ''मोहम्मद ﷺ फक्त पैगंबर आहेत.'' म्हणजे त्यांचे प्रावीण्य पैगंबरीच आहे. हे नाही की ते मानवी वैशिष्ट्यांच्या वर आणि ईश्वरीय वैशिष्ट्यांनी सुसज्जीत असावे की, त्यांना मृत्यूचा सामना करावा लागू नये.

२) उहुदच्या लढाईतील पराभवाच्या कारणांतून एक कारण हे पण होते की, नबी ﷺ च्या बाबतीत, काफिरांनी ही अफवा उठविली की, मोहम्मद ﷺ ठार केले गेले. मुसलमानांत जेव्हा ही बातमी पोहोचली तर यामुळे काही मुसलमान हतोत्साहीत झालेत आणि त्यांनी युद्धातून माघार घेतली. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले की, पैगंबराचा काफिरांकडून वध होऊन जाणे किंवा त्यांना मृत्यू येऊन जाणे काही नवीन गोष्ट तर नाही. मागचे पैगंबर पण वध आणि मृत्यू पावलेले आहेत. जर आपण ﷺ सुद्धा की अशा घटनांना बळी पडले, तर काय तुम्ही या धर्माकडून ही फिरून जाणार? लक्षात ठेवा जो फिरून जाईल, तो आपलेच नुकसान करून घेईल. अल्लाहचे काहीच बिघडवू शकणार नाही. नबी ﷺ च्या मृत्यूच्या वेळी,जेव्हा ह.उमर رضي الله عنه भावनेच्या भरांत पैगंबर ﷺ च्या मृत्यूला नाकारत होते, तेव्हा ह.अबु बकर सिद्दीक رضي الله عنه नी मोठ्या युक्तीने काम घेऊन मिम्बरे रसूल ﷺ च्या बाजूला उभे राहून याच महावाक्याचे पठण केले. ज्यामुळे ह.उमर رضي الله عنه वर पण परिणाम झाला. आणि त्यांना असे वाटले की, ही महावाक्ये आता आताच अवतरीत झाली आहेत.

३) म्हणजे पाय दृढ जमवून ठेवणारे, ज्यांनी सहनशिलता आणि दृढतेचे प्रदर्शन करून अल्लाहच्या देणग्यांचे कार्मिक (अमली) आभार मानले.

४) हे दूर्बलतेचा आणि भित्रेपणाचे प्रदर्शन करण्याच्या साहसात वाढ करण्यासाठी सांगण्यात येत आहे की, मृत्यू तर आपल्यावेळेवर येईलच; मग पळ काढण्याचा आणि भित्रेपणा दाखविण्याचा काय फायदा? याचप्रमाणे केवळ दुनियेची इच्छा केल्याने काही दुनिया तर मिळून जाते परंतु परलोकांत काहीही मिळणार नाही. याच्या उलट परलोकाच्या इच्छुकांना परलोकात परलौकीक देणग्या तर मिळतीलच, दुनियापण अल्लाहतआला त्यांना देतो. पुढे आणखी साहस वाढविण्यासाठी आणि सांत्वनासाठी मागील पैगंबर आणि त्यांचे अनुयायाची सहनशिलता आणि पाय दृढ जमवून ठेवण्याची उदाहरणे दिली जात आहेत.

५) म्हणजे त्यांना जे युद्धाच्या तिव्रतेत हिम्मत हारत नाही आणि दुर्बलता दाखवित नाही.

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوۡۤا اِنۡ تُطِيۡعُوا الَّذِيۡنَ كَفَرُوۡا يَرُدُّوۡكُمۡ عَلٰٓى اَعۡقَابِكُمۡ فَتَنۡقَلِبُوۡا خٰسِرِيۡنَ ﴿١٤٩﴾

**हे ईमानवाल्यांनो! जर तुम्ही काफिरांच्या गोष्टी मान्य केल्या तर ते तुम्हास उलटच्या पायी, उलटून नेतील. (म्हणजे तुम्हास धर्माकडून फिरवून म्हणजे मुरतद करून टाकतील) मग तुम्ही गोत्यांत येऊन जाल (१४९)**

بَلِ اللّٰهُ مَوۡلٰٮكُمۡ ۚ وَهُوَ خَيۡرُ النّٰصِرِيۡنَ ﴿١٥٠﴾

**किंबहुना अल्लाहच तुमचा हितचिंतक आहे; आणि तोच उत्कृष्ट मददगार आहे[१] (१५०)**

سَنُلۡقِىۡ فِىۡ قُلُوۡبِ الَّذِيۡنَ كَفَرُوا الرُّعۡبَ بِمَاۤ اَشۡرَكُوۡا بِاللّٰهِ مَا لَمۡ يُنَزِّلۡ بِهٖ سُلۡطٰنًا ۚ وَمَاۡوٰٮهُمُ النَّارُ ؕ وَبِئۡسَ مَثۡوَى الظّٰلِمِيۡنَ ﴿١٥١﴾

**आम्ही लवकरच काफिरांच्या मनात (तुमचा) धाक टाकून देवू; या कारणाने की, हे अल्लाहबरोबर त्या गोष्टींना शामील करतात, ज्याचा काही पुरावा अल्लाहतआलाने उतारला नाही[२]. यांचे ठिकाण नरकाग्नी आहे आणि या जालीमांची (ती फारच) वाईट जागा आहे (१५१)**

وَلَقَدۡ صَدَقَكُمُ اللّٰهُ وَعۡدَهٗۤ اِذۡ تَحُسُّوۡنَهُمۡ بِاِذۡنِهٖ ۚ حَتّٰۤى اِذَا فَشِلۡتُمۡ وَتَنَازَعۡتُمۡ فِى الۡاَمۡرِ وَعَصَيۡتُمۡ مِّنۡۢ بَعۡدِ مَاۤ اَرٰٮكُمۡ مَّا تُحِبُّوۡنَ ؕ مِنۡكُمۡ مَّنۡ يُّرِيۡدُ الدُّنۡيَا وَمِنۡكُمۡ مَّنۡ يُّرِيۡدُ الۡاٰخِرَةَ ۚ ثُمَّ صَرَفَكُمۡ عَنۡهُمۡ لِيَبۡتَلِيَكُمۡ ۚ وَلَقَدۡ عَفَا عَنۡكُمۡ ؕ وَاللّٰهُ ذُوۡ فَضۡلٍ عَلَى الۡمُؤۡمِنِيۡنَ ﴿١٥٢﴾

**अल्लाहतआलाने तुमच्याशी केलेला वायदा सत्य करून दाखविला; जेव्हा की, तुम्ही त्याच्या हुकूमाने त्यांना कापत होता[३]. येथ पावेतो की, तुम्ही हिंमत हारून बसला आणि कामात झगडू लागला आणि आज्ञाभंग केला[४]; याच्यानंतर की तुमची आवडती वस्तू त्याने तुम्हाला दाखवून दिली[५]. तुमच्यातून काही दुनियेचे इच्छुक होते[६] आणि काहींचा विचार परलोकात होता[७]; मग त्याने तुम्हाला त्याचे कडून फिरवून दिले कारण की, तुमची कसोटी घ्यावी[८] आणि खचितच् त्याने तुमच्या हलगर्जीपणाला माफ करून टाकले आणि ईमानवाल्यांवर अल्लाह मोठाच कृपानिधान आहे[९] (१५२)**

اِذۡ تُصۡعِدُوۡنَ وَلَا تَلۡوٗنَ عَلٰٓى اَحَدٍ وَّالرَّسُوۡلُ يَدۡعُوۡكُمۡ فِىۡۤ اُخۡرٰٮكُمۡ فَاَثَابَكُمۡ غَمًّا ۢ بِغَمٍّ لِّـكَيۡلَا تَحۡزَنُوۡا عَلٰى مَا فَاتَكُمۡ وَلَا مَاۤ اَصَابَكُمۡ ؕ وَاللّٰهُ خَبِيۡرٌۢ بِمَا تَعۡمَلُوۡنَ ﴿١٥٣﴾

**जेव्हा तुम्ही पुढे पुढे जात होता[१०] आणि कोणाकडे लक्षपण देत नव्हता आणि अल्लाहचे पैगंबर तुम्हास तुमच्या मागून आवाज देत होते. मग[११] तुमच्यावर दु:खावर दु:ख कोसळले[१२] की, ज्या वस्तू तुमच्याकडून निघून गेल्या आहेत; त्यांच्यावर दु:ख न करावे आणि झालेल्या त्रासाने उदास होऊ नये[१३]. अल्लाहतआला तुमच्या सर्व कर्मांना जाणतो (१५३)**

१) हा विषय पहिले पण येऊन चुकला आहे. येथे पुन्हा पुनरावृत्ती केली जात आहे, कारण की, उहुदमध्ये हारपासून फायदा उचलत काही काफिर किंवा दांभिक मुसलमानांना हा सल्ला देत होते की, तुम्ही आपल्या वाडवडीलांच्या धर्माकडे पलटून या. अशात मुसलमानांना सांगण्यात आले की, काफिरांचे म्हणणे मान्य करणे, बर्बादी आणि घाट्याला कारणीभूत आहे. यश अल्लाहतआलाच्याच आज्ञापालनांत आहे आणि त्याच्यापेक्षा कोणी चांगला मदतगार नाही.

२) मुसलमानांची हार बघून काही काफिरांच्या मनात हा विचार आला की, ही संधी मुसलमानांचा शेवट करण्याला बडी नामी आहे. या प्रसंगी अल्लाहतआलाने त्यांच्या मनात मुसलमानांचा धाक टाकून दिला. मग त्यांना आपल्या या विचाराला कार्यान्वीत करण्याची हिंमत झाली नाही. (फत्हुल कदीर) सहीऐनच्या हदीसमध्ये आहे की, नबी ﷺ नी म्हटले, मला पांच गोष्टी अशा दिल्या गेल्या आहेत, ज्या माझ्या पूर्वीच्या कुठल्याही पैगंबरांना देण्यात आल्या नाहीत. यातून एक ही आहे की, ''शत्रूच्या मनात एक महिन्याच्या प्रवासा इतक्या अंतरावर माझा धाक टाकून माझी मदत करण्यात आली आहे.'' या हदीसमध्ये ठाऊक झाले की, आपला ﷺ धाक नेहमीसाठी शत्रूच्या मनात टाकून देण्यात आला होता. आणि या महावाक्यावरून माहित पडते की, आपल्याबरोबर आपली उम्मत म्हणजे मुसलमानांचा धाक देखील मुशरिकांवर टाकून देण्यात आला आहे. आणि याचे कारण त्यांचे 'शिर्क' आहे. जणू शिर्क करण्याचे मन, दुसऱ्यांच्या हैबतीमुळे भयभीत रहाते. बहुतेक हेच कारण आहे की, मुसलमानांची एक मोठी संख्या

शिर्कच्या श्रद्धेत आणि कर्मात लिप्त झाली आहेत. शत्रूंना यांची हैबत वाटण्याऐवजी तेच शत्रूकडून हैबतित आहेत.
३) या वायद्याने काही भाष्यकारांनी तीन हजार आणि पांच हजार देवदूतांचे अवतरण अभिप्रेत धरले आहे. परंतु हे मत सुरवातीपासूनच बरोबर नाही. परंतु बरोबर हे आहे की, देवदूतांचे अवतरण फक्त बद्रच्या लढाईपुरतेच खास होते. बाकी राहिला तो वायदा जो या महावाक्यात चर्चित आहे, तर याच्याने अभिप्रेत विजय आणि मदतीचा तो सर्व साधारण वायदा आहे, जो इस्लामवाल्यांना आणि त्याच्या पैगंबराकडून फार पूर्वीपासून केला जाऊन चुकला होता. वास्तविक काही महावाक्ये,मक्केत अवतीर्ण होऊन चुकली होती. आणि याच्याप्रमाणे सुरवातीच्या युद्धात मुसलमान वरचढ आणि विजयी राहिले.
४) या झगडा आणि पापाने अभिप्रेत ५० बाण चालवणाऱ्यांचा तो मतभेद आहे, जो विजय आणि वरचढ पाहून त्यांच्यात झाला होता आणि ज्याच्यामुळे काफिरांना परतून दुसऱ्यांदा हल्ला करण्याचा अवसर मिळाला.
५) याच्याने अभिप्रेत तो विजय आहे, जो सुरवातीला मुसलमानांना मिळाला होता.
६) म्हणजे युद्धात मिळालेली संपत्ती, ज्याकरीता त्यांनी तो डोंगर सोडून दिला, ज्याला न सोडण्याची त्यांना ताकीद करण्यात आली होती.
७) हे ते लोक आहेत ज्यांनी मोर्चा सोडण्याला मना केले आणि नबी ﷺ च्या आदेशाप्रमाणे त्याच जागेवर जमून राहण्याचा आपला इरादा जाहीर केला.
८) म्हणजे विजय मिळाल्यानंतर मग तुमचा पराभव करुन, त्या काफिरांकडून तुम्हाला फिरवून टाकले की तुमची परीक्षा घ्यावी.
९) यात सहाबा कराम ﷺ च्या त्या मोठेपणाचे आणि श्रेष्ठत्वाचे प्रदर्शन आहे, जे त्यांचा हलगर्जीपणा असूनसुद्धा अल्लाहने त्यांच्यावर केला. म्हणजे त्यांच्या चुकांचे स्पष्टीकरण करून की, पुन्हा असे करू नये. अल्लाहने त्यांना माफी करून टाकली की, कोण्या मत्सर बाळगणाऱ्याने त्यांना टोमणे मारू नये. जेव्हा अल्लाहतआलानेच कुरआन करीममध्ये त्यांच्यासाठी सार्वत्रिक माफी जाहीर करून टाकली. तर मग कोणासाठी त्यांना भलेबुरे म्हणण्याची शक्यता कोठे रहाते? सही बुखारीमध्ये एक घटना आलेली आहे की, एका हजच्या वेळेला एका माणसाने ह.उसमान ﷺ वर आक्षेप घेतले की, ते बदर युद्धांत आणि बैते रिजवान मध्ये शामील झाले नाहीत. तसेच ओहुदच्या दिवशी फरार झाले होते. ह.इब्ने उमर ﷺ नी म्हटले की, बद्रच्या लढाईत त्यांची पत्नी (रसूल ﷺ ची मुलगी) आजारी होती. बैत रिजवानच्या प्रसंगी आपण रसूल ﷺ चे प्रतिनिधी बनून मक्केला गेलेले होते आणि ओहुदच्या दिवसाच्या फरारला अल्लाहतआलाने माफ करून टाकले आहे. (पहावे, सही बुखारी अुहदची लढाई)
१०) काफिरांच्या एकत्रित अचानक हल्ल्याने मुसलमानांची जी तारांबळ उडाली आणि बहुसंख्य मुसलमानांनी पळ काढला.
११) नबी ﷺ आपल्या काही साथीदारांसह मागे राहून गेले आणि मुसलमानांना आवाज देत राहिले, ''इलैय्या इबादल्लाह, इलैया इबादल्लाह,'' 'अल्लाहच्या सेवकांनो! माझ्याकडे परतून या, परंतु धावपळीच्या वातावरणांत हे बोलावणे कोण ऐकतो?
१२) 'फअसाबकुम' तुमच्या हलगर्जीमुळे तुम्हाला दु:खावर दु:ख दिले. पहिल्या दु:खाने अभिप्रेत आहे, युद्धातील लुट आणि काफिरांवर विजय न मिळणेचे दु:ख आणि दुसऱ्या दु:खाने अभिप्रेत आहे, मुसलमानांचे हौतात्म्य त्यांचे जखमी होणे, नबी ﷺ च्या आदेशाच्या विरूद्ध जाणे, आणि आपण ﷺ च्या हौतात्म्याची (शहादत) बातमी यामुळे होणारे दु:ख.
१३) म्हणजे हे दु:खावर दु:ख यासाठी दिले की, तुमच्यांत कदाचित् सहन करण्याची ताकद आणि साहसाचा दृढनिश्चय निर्माण झाला असता, तर मग माणसाला ज्या वस्तू आपल्यापासून निघून गेल्याचे दु:ख आणि पोहोचणारी खडतर अवस्था यावर खेद वाटला नसता.

ثُمَّ اَنْزَلَ عَلَيْكُمْ مِّنْۢ بَعْدِ الْغَمِّ اَمَنَةً نُّعَاسًا يَّغْشٰى طَآىِٕفَةً مِّنْكُمْ ۙ وَطَآىِٕفَةٌ قَدْ اَهَمَّتْهُمْ اَنْفُسُهُمْ يَظُنُّوْنَ بِاللّٰهِ غَيْرَ الْحَقِّ ظَنَّ الْجَاهِلِيَّةِ ۭ يَقُوْلُوْنَ هَلْ لَّنَا مِنَ الْاَمْرِ مِنْ شَيْءٍ ۭ قُلْ اِنَّ الْاَمْرَ كُلَّهٗ لِلّٰهِ ۭ يُخْفُوْنَ فِيْٓ اَنْفُسِهِمْ مَّا لَا يُبْدُوْنَ لَكَ ۭ يَقُوْلُوْنَ لَوْ كَانَ لَنَا مِنَ الْاَمْرِ شَيْءٌ مَّا قُتِلْنَا هٰهُنَا ۭ قُلْ لَّوْ كُنْتُمْ فِيْ بُيُوْتِكُمْ لَبَرَزَ الَّذِيْنَ كُتِبَ عَلَيْهِمُ الْقَتْلُ اِلٰى مَضَاجِعِهِمْ ۚ وَلِيَبْتَلِيَ اللّٰهُ مَا فِيْ صُدُوْرِكُمْ وَلِيُمَحِّصَ مَا فِيْ قُلُوْبِكُمْ ۭ وَاللّٰهُ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ﴿١٥٤﴾

**मग त्याने या दु:खानंतर तुमच्यावर शांती अवतरीत केली आणि तुमच्यातून एका समूहाला शांततेची झोप येऊ लागली[१] हं! आणखी काही लोक असेपण होते; ज्यांना आपल्या जीवाची पडली होती, ते[२] अल्लाहतआला बरोबर विनाकरण अज्ञानपूर्ण चुकीची धारणा बाळगत होते[३] आणि म्हणत होते काय, आम्हालापण कोण्या गोष्टीचा अधिकार आहे[४]? आपण सांगून टाका की, सर्व कामांची मदार अल्लाहतआलावर आहे[५]. हे लोक आपल्या मनातील गुप्त गोष्टी सांगत नाही[६] (ते) म्हणतात की, जर आम्हाला काहीही अधिकार असते तर येथे ठार न झालो असतो[७]. आपण सांगून टाका की, जरी तुम्ही आपल्या घरी असता परंतु ज्यांच्या नशिबी ठार होणे होते, ते आपल्या ठार होण्याचे जागी चालू लागले असते[८]. अल्लाहतआलाला जे काही तुमच्या मनात होते ते अजमावयाचे (होते) आणि जे काही तुमच्या मनांत आहे, त्याला पाकसाफ करावयाचे[९] होते आणि अल्लाहतआला मनातील गुप्त गोष्टी जाणतो[१०] (१५४)**

१) या पळापळीच्या वातावरणानंतर अल्लाहतआलाने पुन्हा मुसलमानांवर आपली कृपा केली आणि युद्धाच्या मैदानात बाकी असलेल्यांवर गुंगी टाकून दिली. ही गुंगी अल्लाहकडून खास दया (सकीनत) आणि मदतीची निशाणी होती. ह. अबुतलहा ﷺ म्हणतात, मी पण त्या लोकांपैकी होतो, ज्यांच्यावर उहुदच्या दिवशी गुंगी आच्छादली जात होती. इतके की, माझी तलवार कित्येक वेळा माझ्या हातून पडली; मी तिला धरत होतो, ती परत पडून जात होती, पुन्हा धरत होतो, ती पुन्हा पडत होती. (सहीह बुखारी)

२) याच्याने अभिप्रेत दांभिक लोक आहेत. हे तर उघड आहे की, अशा स्थितीत त्यांना आपल्या जिवाचीच काळजी होती.

३) ती ही वाईट धारणा होती की, नबी ﷺ चा मामला खोटा आहे. हे ज्या धर्मांचे आवाहन करीत आहे. त्याचा भविष्यकाळ अंधकारमय भरलेला आहे. त्यांना अल्लाहतआलाची मदतच प्राप्त नाही. वगैरे.

४) म्हणजे काय आता आमच्यासाठी अल्लाहकडून विजय व मदतीची शक्यता आहे? किंवा हे की काय आमचीपण कुठली गोष्ट चालू शकते, आणि मानली जाऊ शकते?

५) तुमच्या किंवा शत्रूच्या अखत्यारांत नाही. मदतपण त्यांच्याकडून येईल आणि यश पण त्याच्याच हुकूमाने मिळेल आणि आदेश किंवा मनाईपण त्याचेचकडून असेल.

६) आपल्या मनांत दांभिकत्व (निफाक) लपवून आहेत. उघडपणे तर असे म्हणतात की ते मार्गदर्शनाचे अभिलाषी आहेत.

७) हे ते आपसांत म्हणत किंवा आपल्या मनांत म्हणत.

८) अल्लाहतआलाने म्हटले, अशा प्रकारच्या गोष्टीचा काय उपयोग ? मृत्यू तर कुठल्याही स्थितीत येणे आहे आणि त्याच जागेवर येणार आहे, जेथे अल्लाहकडून लिहिली जाऊन चुकली आहे. जर तुम्ही घरात बसलेला असाल आणि तुमचा मृत्यू कोण्या निर्जन जागी लिहिलेला असेल तर अल्लाहचा निर्णय (कजा) जरूर तुम्हाला तेथे खेचून नेईल.

९) हे जे काही झाले,त्याच्याने एक उद्देश हा पण होता की, तुमच्या हृदयात जे काही आहे म्हणजे ईमान, त्याला आजमवावे. (म्हणजे मुनाफीक वेगळे होऊन जावेत.) आणि मग तुमच्या मनाला शैतानी वाईट विचारांपासून पवित्र करून टाकावे.

१०) म्हणजे त्याला तर ठाऊक आहे की, खरा मुसलमान कोण आहे आणि दांभिकतेचे वस्त्र कोणी परिधान करून ठेवले आहे? जिहादच्या वेगवेगळ्या प्रयोजनांमध्ये एक प्रयोजन हे पण आहे की, याच्याने विश्वासू आणि दांभिक स्पष्टपणे जाहीर होऊन जातात. ज्यांना सर्वसाधारण लोक सुद्धा नंतर पाहून आणि ओळखून घेतात.

إِنَّ الَّذِينَ تَوَلَّوْا مِنكُمْ يَوْمَ الْتَقَى الْجَمْعَانِ إِنَّمَا اسْتَزَلَّهُمُ الشَّيْطَانُ بِبَعْضِ مَا كَسَبُوا وَلَقَدْ عَفَا اللَّهُ عَنْهُمْ إِنَّ اللَّهَ غَفُورٌ حَلِيمٌ ﴿١٥٥﴾

नि:संशय तुमच्यातून ज्या लोकांनी त्या दिवशी पाठ दाखविली, ज्या दिवशी दोन्ही समूहात आमना सामना झाला होता. हे लोक आपल्या काही हलगर्जीपणामुळे शैतानाच्या फसविण्यात येऊन[१] गेले. परंतु विश्वास ठेवा की, अल्लाहतआलाने त्यांना क्षमा करून टाकले[२]. अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयार्द्र आहे ﴿१५५﴾

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تَكُونُوا كَالَّذِينَ كَفَرُوا وَقَالُوا لِإِخْوَانِهِمْ إِذَا ضَرَبُوا فِي الْأَرْضِ أَوْ كَانُوا غُزًّى لَّوْ كَانُوا عِندَنَا مَا مَاتُوا وَمَا قُتِلُوا لِيَجْعَلَ اللَّهُ ذَٰلِكَ حَسْرَةً فِي قُلُوبِهِمْ وَاللَّهُ يُحْيِي وَيُمِيتُ وَاللَّهُ بِمَا تَعْمَلُونَ بَصِيرٌ ﴿١٥٦﴾

हे ईमानवाल्यानो तुम्ही त्या लोकांसारखे होऊन जाऊ नका, ज्यांनी 'कुफ्र' केले आणि आपल्या भावांच्या बाबतीत असे सांगितले की, जेव्हा ते प्रवासात असो किंवा जिहादमध्ये जर ते आमच्या बरोबर राहिले असते तर न ते मरते न मारले जाते[३]. याचे कारण हे होते की, या विचाराला अल्लाहतआलाने त्यांच्यासाठी मानसिक खेदाला कारणीभूत बनवून द्यावे[४]. अल्लाहतआलाच जिवंत ठेवतो आणि मारतो; आणि अल्लाहतआला तुमच्या कर्मांना पहात आहे ﴿१५६﴾

وَلَئِن قُتِلْتُمْ فِي سَبِيلِ اللَّهِ أَوْ مُتُّمْ لَمَغْفِرَةٌ مِّنَ اللَّهِ وَرَحْمَةٌ خَيْرٌ مِّمَّا يَجْمَعُونَ ﴿١٥٧﴾

आणि जर तुम्ही अल्लाहतआलाच्या मार्गात 'शहीद' केले जाल, किंवा आपल्या मृत्यूने मृत्यू पावाल, नि:संशय अल्लाहतआलाची क्षमा आणि दया त्यापेक्षा उत्तम आहे, जे हे जमा करीत आहे[५] ﴿१५७﴾

وَلَئِن مُّتُّمْ أَوْ قُتِلْتُمْ لَإِلَى اللَّهِ تُحْشَرُونَ ﴿١٥٨﴾

आणि खचितच् जरी तुम्ही मृत्यू पावाल किंवा मारून टाकले जाल, जमा तर (शेवटी) अल्लाहतआला जवळच होणे आहे ﴿१५८﴾

१) म्हणजे ओहुदमध्ये मुसलमानांकडून जो हलगर्जीपणा झाला, याचे कारण त्यांचे काही मागील दौर्बल्य होते, ज्यामुळे शैतान त्या दिवशी सुद्धा त्यांना मार्गभ्रष्ट करण्यात यशस्वी झाला. ज्याप्रमाणे काही पूर्वीच्या लोकांचे म्हणणे आहे की, ''पुण्याचा बदला हा पण आहे की त्याच्यानंतर पुन्हा पुण्य करण्याची सुबुद्धी मिळते, आणि वाईटाचा बदला हा की, त्याच्यानंतर वाईटाचा मार्ग प्रशस्त होतो'' म्हणजे पुण्याने पुण्याचा आणि वाईटाने वाईटाचा मार्ग प्रशस्त होतो आणि सपाट होतो.

२) सहाबा ﷺ च्या चुका, त्यांचे परिणाम आणि त्यांतील प्रयुक्तींचे वर्णन केल्यानंतर अल्लाहतआला आपल्याकडून त्यांना क्षमा केल्याचे जाहीर करीत आहे. त्यामुळे त्यांचे एक तर अल्लाहच्या दरबारी प्रिय होणे स्पष्ट होते. आणि दुसरे सर्वसाधारण मोमिनांना तंबी आहे की, या मोमिन सत्यनिष्ठांना जेव्हा अल्लाहतआलाने क्षमा करून टाकली आहे; तर आता कोणासाठी हे योग्य नाही की, त्यांची निंदानालस्ती किंवा त्यांच्यावर टिका करावी.

३) ईमानवाल्यांना या श्रद्धेच्या झगड्यापासून मना करण्यात येत आहे जी श्रद्धा काफिर आणि दांभिक यांच्यात होती. कारण की ही श्रद्धा भित्रेपणावर आधारित आहे. याच्या उलट जर अशी श्रद्धा असेल की,मृत्यू आणि जीवन अल्लाहच्या हातांत आहे. तसेच मृत्यूची एकवेळ निश्चित आहे. तर याच्याने माणसांत हिंमत आणि धाडस आणि अल्लाहच्या मार्गात लढण्याची भावना निर्माण होते.

४) चर्चित श्रद्धेचा झगडा मानसिक खेदालाच कारणीभूत होतो. की जर ते प्रवासाला किंवा युद्धाच्या मैदानात न जाते किंबहुना घरातच थांबून राहते तर मृत्यूला कवटाळण्यापासून वाचून जाते. वास्तविक मृत्यू तर मजबूत किल्ल्यातपण येतो.''तुम्ही जेथे कोठे असाल, मृत्यू तुम्हाला येऊन गांठेल, जरी तुम्ही मजबुत किल्यांत असाल'' (सू. निसा-७८) म्हणून या खेदापासून मुसलमानच वांचू शकतात. ज्यांच्या श्रद्धा बरोबर आहे.

५) मृत्यूच तर कुठल्याही प्रकारे येणे आहे. परंतु जर मृत्यू असा येईल, ज्याच्यानंतर मनुष्य अल्लाहच्या क्षमा आणि दयेला पात्र होईल; तर हे दुनियेच्या धनसंपत्ती पेक्षा फारच उत्तम आहे; ज्याच्या जमविण्यात मनुष्य सारे आयुष्य घालवून देतो. म्हणून अल्लाहच्या मार्गात 'जिहाद' करण्यापासून पळ काढणे नाही. यात आवड व इच्छा असली पाहिजे; की अशाप्रकारे अल्लाहच्या दया आणि क्षमेची खात्री होऊन जाते. या अटीवर की हे युद्धात भाग घेणे फक्त आणि फक्त अल्लाहच्याच प्रसन्नतेसाठी असावे.

فَبِمَا رَحْمَةٍ مِّنَ اللّٰهِ لِنْتَ لَهُمْ ۚ وَلَوْ كُنْتَ فَظًّا غَلِيْظَ الْقَلْبِ لَا نْفَضُّوْا مِنْ حَوْلِكَ ۖ فَاعْفُ عَنْهُمْ وَاسْتَغْفِرْ لَهُمْ وَشَاوِرْهُمْ فِي الْاَمْرِ ۚ فَاِذَا عَزَمْتَ فَتَوَكَّلْ عَلَى اللّٰهِ ۭ اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الْمُتَوَكِّلِيْنَ ﴿١٥٩﴾

**अल्लाहतआलाच्या दयेने आपण (सल्ल.) त्यांच्यावर मृदु हृदय आहात; आणि जर आपण कटूभाषी आणि कठोर हृदयाचे असता तर हे सर्व आपल्याजवळून पळून गेले असते. म्हणून आपण (सल्ल.) त्यांना क्षमा करावी; आणि त्यांच्यासाठी[१] क्षमेची प्रार्थना करावी आणि कामाची सल्लामसलत त्यांच्याशी करीत जा[२]. मग जेव्हा आपला पक्का विचार होऊन जाईल, तर अल्लाहवर भरोसा करावा[३], नि:संशय अल्लाहतआला (त्याच्यावर) भरोसा करणाऱ्यांशी प्रेम करतो (१५९)**

اِنْ يَّنْصُرْكُمُ اللّٰهُ فَلَا غَالِبَ لَكُمْ ۚ وَاِنْ يَّخْذُلْكُمْ فَمَنْ ذَا الَّذِيْ يَنْصُرُكُمْ مِّنْ بَعْدِهٖ ۭ وَعَلَى اللّٰهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُؤْمِنُوْنَ ﴿١٦٠﴾

**जर अल्लाहतआला तुमची मदत करेन तर कोणीही तुमच्यावर प्रबळ होणार नाही आणि जर तो तुम्हास सोडून देईन तर त्याच्यानंतर कोण आहे जो तुमची मदत करीन? ईमानवाल्यांना अल्लाहतआलावरच भरोसा केला पाहिजे (१६०)**

وَمَا كَانَ لِنَبِيٍّ اَنْ يَّغُلَّ ۭ وَمَنْ يَّغْلُلْ يَاْتِ بِمَا غَلَّ يَوْمَ الْقِيٰمَةِ ۚ ثُمَّ تُوَفّٰى كُلُّ نَفْسٍ مَّا كَسَبَتْ وَهُمْ لَا يُظْلَمُوْنَ ﴿١٦١﴾

**हे अशक्य आहे की, पैगंबराकडून लबाडी (खियानत) होऊन जाईल[४]. प्रत्येक लबाडी करणारा (ज्या वस्तूत लबाडी केली) तिला घेऊन कयामतच्या दिवशी हजर होईल. प्रत्येक मनुष्याला आपल्या कर्माचा पुरेपुर बदला दिला जाईल आणि त्याच्यावर कुठल्याही प्रकारचा जुलूम केला जाणार नाही (१६१)**

१) नबी ﷺ जे उच्च आचरणाचे होते; अल्लाहतआला आपल्या या पैगंबरावर एका उपकाराचे वर्णन करीत आहे, की आपणात जी नम्रता आणि शालिनता आहे, हा अल्लाहतआलाच्या खास मेहरबानीचा परिणाम आहे. आणि ही नम्रता, आवाहन आणि प्रचाराला फारच आवश्यक आहे. जर हे (गुण) आपणांत नसते; किंबहुना याच्या उलट आपणात शिघ्रकोपी आणि कठोर हृदयाचे असते, तर लोक आपल्या जवळ येण्याऐवजी आपल्यापासून दूर पळाले असते. या करीता आपण क्षमेने (दरगुजर) काम घेत चला.

२) म्हणजे मुसलमानांच्या समाधानासाठी त्यांच्याशी सल्लामसलत करून घेत जा. या महावाक्याने सल्लामसलत करण्याचे महत्त्व त्याचे फायदेकारक होणे, आणि त्याची आवश्यकता व शास्त्राप्रमाणे योग्य असणे सिद्ध होते. सल्लामसलत करण्याचा हा आदेश काहीजवळ आवश्यक आणि काहीजवळ उत्कृष्टअसा आहे(इब्ने कसीर). इमाम शौकानी लिहितात, सत्ताधाऱ्यांना हे आवश्यक आहे की, त्यांनी धर्मपंडीतांशी अशा मामल्यात सल्लामसलत करावी ज्यांचे त्यांना ज्ञान नाही किंवा ज्याबाबतीत त्यांना शंका आहे. लष्कराच्या श्रेष्ठींना, लष्करी मामल्यात प्रतिष्ठित लोकांना जनतेच्या प्रश्नांत आणि अधिकाऱ्यांच्या हाताखालील लोकांना त्यांच्या विभागातील आवश्यकता आणि अडी अडचणी बाबत सल्लामसलत करावी. इब्ने अतिया म्हणतात, अशा अधिकाऱ्यांना पदावरून हटवण्याच्या निर्णयांवर काही मतभेद नाही, जे ज्ञानी आणि धार्मिक लोकांशी सल्लामसलत करीत नाही. ही सल्लामसलत फक्त त्या मामल्यापूरती मर्यादित असावी; ज्यांच्याबाबत धर्मशास्त्र मौन बाळगते. किंवा ज्याचा संबंध व्यवस्थापकीय कामांशी आहे. (फत्हुल कदीर)

३) म्हणजे सल्लामसलती नंतर ज्यावर आपला निर्णय पक्का होऊन जाईल. मग अल्लाहवर भरोसा करून ते करून टाकावे. यामुळे एक तर ही गोष्ट ठाऊक झाली की, सल्लामसलतीनंतर पण शेवटचा निर्णय अधिकाऱ्याचा राहील. सल्लामसलतीत भाग घेणाऱ्यांचा नाही किंवा त्यांच्या संख्या बाहुल्याचा पण नाही; जसे की लोकशाहीत असते. दुसरे असे की, सर्व भरोसा अल्लाहच्या जातवर असावयास हवा. सल्ला देणाऱ्यांच्या अक्कल व ज्ञानावर नसावा. पुढील महावाक्यात पण, अल्लाहवर भरोसा करण्याची आणखी ताकीद देण्यात आली आहे.

४) ओहुदच्या लढाईच्या काळांत जे लोक मोर्चा सोडून युद्धातील गनीमतचा माल जमा करण्यासाठी धावपळ करीत होते त्यांना असे वाटत होते की, जर आम्ही लवकर पोहचलो नाही तर, युद्धातील गनीमतचा मालदुसरे लोक घेऊन जातील. यावर तंबी देण्यात येत आहे की, तुम्ही असा विचार कसा केला की, या मालामध्ये तुमचा वाटा तुम्हाला दिला जाणार नाही. काय तुम्हाला मोहम्मद ﷺ च्या अमानती बद्दल संतोष नाही? लक्षात ठेवा की, एका पैगंबराकडून कुठल्याही प्रकारची लबाडीची शक्यता शक्यच नाही. कारण लबाडी पैगंबरीच्या बिलकुल विरुद्ध आहे. जर पैगंबरच लबाड असेल तर त्याच्या पैगंबरीवर कसा काय विश्वास ठेवला जाईल? लबाडी (खयानत) फार मोठे पाप आहे. हदीसीमध्ये याची फार निर्भत्सना करण्यात आली आहे.

أَفَمَنِ اتَّبَعَ رِضْوَانَ اللَّهِ كَمَنْ بَاءَ بِسَخَطٍ مِّنَ اللَّهِ وَمَأْوَاهُ جَهَنَّمُ ۚ وَبِئْسَ الْمَصِيرُ ﴿١٦٢﴾

काय तो मनुष्य जो अल्लाहतआलाच्या प्रसन्नतेचा इच्छुक असेल, त्या मनुष्यासारखा आहे, जो अल्लाहतआलाचा कोप घेऊन येतो आणि ज्याचे ठिकाण नरकाग्नी आहे आणि ती फार वाईट जागा आहे (१६२)

هُمْ دَرَجَاتٌ عِندَ اللَّهِ ۗ وَاللَّهُ بَصِيرٌ بِمَا يَعْمَلُونَ ﴿١٦٣﴾

अल्लाहतआलाजवळ त्यांचे वेगवेगळे दर्जे आहेत आणि त्यांच्या सर्व कर्मांना अल्लाहतआला फार चांगल्याप्रकारे पहात आहे (१६३)

لَقَدْ مَنَّ اللَّهُ عَلَى الْمُؤْمِنِينَ إِذْ بَعَثَ فِيهِمْ رَسُولًا مِّنْ أَنفُسِهِمْ يَتْلُو عَلَيْهِمْ آيَاتِهِ وَيُزَكِّيهِمْ وَيُعَلِّمُهُمُ الْكِتَابَ وَالْحِكْمَةَ وَإِن كَانُوا مِن قَبْلُ لَفِي ضَلَالٍ مُّبِينٍ ﴿١٦٤﴾

(النصف)

नि:संशय अल्लाहतआलाचा मुसलमानांवर मोठा उपकार आहे की, त्यांच्यातून एक पैगंबर त्यांच्यांत पाठविला[१]; जो त्याची महावाक्ये त्यांना वाचून ऐकवितो आणि त्यांना पवित्र करितो आणि त्यांना पुस्तक आणि ज्ञान[२] शिकवितो. खचितच् हे सर्व यापूर्वी स्पष्ट चूकीत पडलेले होते (१६४)

أَوَلَمَّا أَصَابَتْكُم مُّصِيبَةٌ قَدْ أَصَبْتُم مِّثْلَيْهَا قُلْتُمْ أَنَّىٰ هَٰذَا ۖ قُلْ هُوَ مِنْ عِندِ أَنفُسِكُمْ ۗ إِنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿١٦٥﴾

आणि जेव्हा तुमच्च्यावर संकट येऊन पडते (की) तुम्ही याहून दुप्पट संकट पोहचवून चुकला आहात[३], तेव्हा म्हणू लागले की, हे कोठून येऊन लागले? आपण सांगून टाका की, हे स्वत: तुमच्याकडूनच आहे[४]. नि:संशय अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे (१६५)

१) नबीचे मनुष्य आणि मानवांतूनच होण्याबद्दल अल्लाहतआला एका उपकाराढाखल वर्णन करीत आहे. आणि हा खरोखरच फार मोठा उपकार आहे, की एक तर तो आपल्या समाजाच्या भाषेत आणि त्यांच्या उच्चारण्याच्या पद्धतीप्रमाणे (लहेजा) अल्लाहचा संदेश पोहचवेल; ज्याला समजणे प्रत्येक व्यक्तीला सोपे जाईल. दुसरे असे की, तो आपल्या सारखाच असल्याने लोक त्याच्याशी मिळून मिसळून जातील आणि त्याच्या जवळ येतील. तिसरे असे की, मानवाला मानवाचे म्हणजे मनुष्याचे अनुकरण तर शक्य आहे परंतु देवदूतांचे अनुकरण करणे त्याच्या आवाक्यातील गोष्ट नाही. आणि देवदूत मानवाच्या समज आणि बुद्धीमत्तेच्या खोलीला आणि बारकाव्याला समजू शकत नाही. म्हणून जर पैगंबर देवदूतामधून असते, तर ते या साऱ्या वैशिष्ट्यांनी कोरे असते, जी आवाहन आणि प्रचारासाठी नितांत आवश्यक आहे. म्हणून जेवढेपण पैगंबर आले, सर्वच्या सर्व मानव होते. कुरआनाने त्यांच्या मानवी होण्याला खूप स्पष्ट करून वर्णन केले आहे. उदा.म्हटले, ''आम्ही आपणापूर्वी जेवढे पण पैगंबर पाठविले ते पुरूष होते, ज्यांच्यावर आम्ही वह्य करीत होतो.'' (सू. यूसुफ - १०९ सू. अंबिया-७) ''आम्ही आपल्यापूर्वी जितकेपण पैगंबर पाठविले ते जेवण करीत असत आणि बाजारात चालत (फिरत) असत (सू. फुरकान -२०) आणि स्वत: पैगंबर ﷺ ना पवित्र वाणीद्वारे सांगण्यांत आले, ''आपण सांगून टाका, मी पण तर तुमच्यासारखा फक्त एक माणूस आहे तथापि माझ्यावर वह्यचे अवतरण होते.'' (सू. हा मीम सजदा-६) आज पुष्कळसे लोक या हकिकतीला समजत नाही आणि चूकीच्या श्रद्धेत पडलेले आहेत.

२) या महावाक्यात पैगंबरीची तीन महत्त्वाचे उद्देश वर्णन करण्यात आले आहे. १) महावाक्यांचे वाचन २) चित्तशुद्धी करणे ३) पुस्तक आणि ज्ञानाचे शिक्षण. पुस्तकाच्या शिकवण्यात वाचन आपोआपच येऊन जाते. वाचनाबरोबरच शिक्षण शक्य आहे. वाचनाशिवाय शिक्षणाची कल्पना ही शक्य नाही. याच्या शिवाय वाचनाला एका वेगळ्या उद्देशाने वर्णन करण्यांत आले आहे, ज्यामुळे या मुद्द्याचे स्पष्टीकरण अपेक्षित आहे की, वाचन (तिलावत) स्वत: एक पवित्र पुण्यांचे काम आहे; जरी वाचणारा त्याचा अर्थ समजो अगर न समजो. कुरआनाच्या अर्थ आणि मंतव्याला समजण्याचा प्रयत्न करणे खचितच् प्रत्येक मुसलमानासाठी आवश्यक आहे. परंतु जोपर्यंत हा उद्देश साध्य होत नाही किंवा इतकी साध्य करण्याच्या क्षमतेला पोहचू शकत नाही; तोपर्यंत कुरआनाच्या तिलावतला आक्षेप घेणे किंवा त्यांत सुस्ती करणे योग्य नाही. पाकसाफ (चित्तशुद्धी) ने अभिप्रेत श्रद्धा, कर्म आणि चारित्र्यांत सुधारणा करणे आहे. ज्याप्रमाणे आपण ﷺ नी त्यांना 'शिर्क' पासून हटवून एकेश्वरवादाकडे आणले. त्याचप्रमाणे फार वाईट चारित्र्य आणि वाईट चालिरितीवाल्या समाजाला चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या उच्च स्तरावर नेले. ज्ञानाने अभिप्रेत बहुतेक भाष्यकारांजवळ हदीस आहे.

३) म्हणजे ओहुदमध्ये तुमची सत्तर माणसे शहीद झाली, तर बद्रमध्ये तुम्ही सत्तर काफिरांना ठार केले होते आणि सत्तर कैदी बनविले होते.

४) म्हणजे तुमच्या त्या चुकीमुळे जी रसूल ﷺ चा सख्त आदेश असून सुद्धा डोंगरातील मोर्चा सोडून तुम्ही केली होती. जसे की याचा तपशील पहिले येऊन चुकला की, या चूकीमुळे काफिरांच्या एका तुकडीला या तुडीवर दुसऱ्यांदा हल्ला करण्याची संधी मिळाली.

وَمَآ اَصَابَكُمۡ يَوۡمَ الۡتَقَى الۡجَمۡعٰنِ فَبِاِذۡنِ اللّٰهِ وَلِيَعۡلَمَ الۡمُؤۡمِنِيۡنَ ﴿۱۶۶﴾

**आणि तुम्हास जे काही त्यादिवशी मिळाले, ज्या दिवशी दोन समूहात आमना सामना झाला ते सर्व अल्लाहच्या हुकूमाने होते आणि यासाठी की, अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना जाणून घ्यावे (१६६)**

وَلِيَعۡلَمَ الَّذِيۡنَ نَافَقُوۡا ۖۚ وَقِيۡلَ لَهُمۡ تَعَالَوۡا قَاتِلُوۡا فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ اَوِ ادۡفَعُوۡا ؕ قَالُوۡا لَوۡ نَعۡلَمُ قِتَالًا لَّا اتَّبَعۡنٰكُمۡ ؕ هُمۡ لِلۡكُفۡرِ يَوۡمَئِذٍ اَقۡرَبُ مِنۡهُمۡ لِلۡاِيۡمَانِ ۚ يَقُوۡلُوۡنَ بِاَفۡوَاهِهِمۡ مَّا لَيۡسَ فِىۡ قُلُوۡبِهِمۡ ؕ وَاللّٰهُ اَعۡلَمُ بِمَا يَكۡتُمُوۡنَ ﴿۱۶۷﴾

**आणि दांभिकांनी पण जाणून घ्यावे(१). ज्यांना सांगण्यात आले की, या अल्लाहच्या मार्गात जिहाद करा किंवा काफिरांना हटवा. तेव्हा ते म्हणू लागले की, जर आम्ही युद्ध जाणतो, तर जरूर साथ देतो(२). ते या दिवशी ईमानच्या तुलनेत 'कुफ्र' च्या अधिक जवळ होते(३). आपल्या तोंडाने त्या गोष्टी सांगतात. ज्या त्यांच्या मनांत नाही(४). आणि अल्लाहतआला खूप चांगल्या प्रकारे जाणतो; जे हे लपवितात (१६७)**

اَلَّذِيۡنَ قَالُوۡا لِاِخۡوَانِهِمۡ وَقَعَدُوۡا لَوۡ اَطَاعُوۡنَا مَا قُتِلُوۡا ؕ قُلۡ فَادۡرَءُوۡا عَنۡ اَنۡفُسِكُمُ الۡمَوۡتَ اِنۡ كُنۡتُمۡ صٰدِقِيۡنَ ﴿۱۶۸﴾

**हे ते लोक आहेत जे स्वत:ही बसून राहिले आणि (आपल्या) भावांबद्दल म्हणू लागले की, जर त्यांनी आमची गोष्ट मान्य केली असती तर ठार मारले गेले नसते. सांगून टाका की, जर तुम्ही खरे आहात तर आपल्या जिवांवरून मृत्यूला हटवून टाका(५) (१६८)**

وَلَا تَحۡسَبَنَّ الَّذِيۡنَ قُتِلُوۡا فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ اَمۡوَاتًا ؕ بَلۡ اَحۡيَآءٌ عِنۡدَ رَبِّهِمۡ يُرۡزَقُوۡنَ ﴿۱۶۹﴾

**जे लोक अल्लाहच्या मार्गात 'शहीद' करण्यांत आले, त्यांना अजिबात मृत समजू नका. परंतु ते जिवंत आहेत. आपल्या पालनकर्त्यासमीप उपजिवीका प्राप्त करीत आहे(६) (१६९)**

१) म्हणजे ओहुदमध्ये जे काही तुमचे नुकसान झाले, ते अल्लाहच्या आदेशानेच झाले आहे. (यासाठी की, तुम्ही यापुढे पैगंबराचे आज्ञापालन जसा की, त्याच्या आज्ञापालनाचा हक्क आहे, करावे) या शिवाय याचा एक उद्देश मोमिनंना आणि दांभिकांना एक दुसऱ्यापासून वेगळे आणि ओळखणे पण होते.

२) लढाई जाणण्याचा अर्थ हा आहे की, जर खरोबर तुम्ही लोक लढाई लढण्यास जात असता, तर आम्हीही तुमची साथ दिली असती, परंतु तुम्ही लोक तर लढाई ऐवजी, आपल्या स्वत:ला बर्बादीच्या खड्ड्यांत झोकण्यासाठी जात आहे. अशा चुकीच्या कामात आम्ही, तुमचा साथ का द्यावा. हे अब्दुल्लाह बिन उबई आणि त्याच्या साथीदारांनी यासाठी म्हटले की, त्यांची गोष्ट मान्य करण्यात आली नव्हती. आणि त्यावेळी म्हटले, ज्यावेळी ते 'शऊत' मुक्कामी पोहचून परत फिरत होते, अब्दुल्लाह बिन हराम अन्सारी त्यांना समजाऊन लढाईत भाग घेण्यासाठी प्रयत्न करीत होते (आणखी तपशील मागे येऊन चुकला आहे.)

३) आपले दांभिकत्व आणि त्या गोष्टींच्या कारणाने ज्या त्यांनी केल्या.

४) म्हणजे तोंडाने तर ते जाहीर केले जे उल्लेखित आहे. पण मनांत असे होते की, आमच्या वेगळे होण्याने, एक तर मुसलमानांमध्ये सुद्धा दौर्बल्य निर्माण होईल. दुसरे म्हणजे काफिरांनाच फायदा होईल. उद्देश इस्लाम, मुसलमान आणि नबी करीम ﷺ ला नुकसान पोहोचविणे होता.

५) हे दांभिकाच्या त्या म्हणण्याचे खंडन आहे की, ''जर ते आमची गोष्ट मान्य करते, तर ठार मारले न जाते.'' अल्लाहतआलाने म्हटले, की जर तुम्ही खरे आहांत तर आपल्यावरून मृत्यू टाळून दाखवा. अर्थ हा आहे की, दैवापुढे कोणाचे काही चालत नाही. मृत्यूसुद्धा जेथे आणि जसा दैवात आहे, तसा आणि त्याचप्रमाणे येऊन राहील. याकरीता जिहाद आणि अल्लाहच्या मार्गात युद्ध करण्यास नकार देणे व त्यापासून पळ काढणे हे कोणाला मृत्यूच्या दाढेतून वाचवू शकत नाही.

६) हुतात्म्यांचे हे जीवन वास्तविक आहे की, काल्पनिक, खचितच् वास्तविक आहे. परंतु त्याची जाणीव दुनियावाल्यांना नाही. (जसे की, कुरआनाने स्पष्ट करून दिले आहे. कृपया पहावे सू. बकर: चे महावाक्य क्र.१५४) मग या जीवनाचा अर्थ काय आहे? काही म्हणतात की, कबरीत त्यांचे आत्मे त्यांचेकडे परत पाठवून दिले जातात आणि तेथे ते अल्लाहच्या देणग्यांचा आस्वाद घेतात. काही म्हणतात स्वर्गातील फुलांचा सुवास त्यांना पोहचतो; ज्याच्याने त्यांचे शरीर आणि आत्मे सुगंधीत रहातात. परंतु हदीसीने एक तिसरा प्रकार माहित पडतो, म्हणून तोच बरोबर आहे. तो हा की, त्यांचे आत्मे हिरव्या रंगाच्या पक्ष्याच्या पंखात किंवा छातीत दाखल करून देण्यांत येतात आणि ते स्वर्गात खात फिरतात आणि तेथील देणग्यांनी लाभान्वयीत होतात (फत्हुल कदीर सहीह मुस्लीमच्या हवाल्याने)

فَرِحِيْنَ بِمَآ اٰتٰىهُمُ اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖ ۙ وَيَسْتَبْشِرُوْنَ بِالَّذِيْنَ لَمْ يَلْحَقُوْا بِهِمْ مِّنْ خَلْفِهِمْ ۙ اَلَّا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ۝١٧٠

अल्लाहतआलाने आपली कृपा जी त्यांना देऊन ठेवली आहे, त्यामुळे फारच आनंदात आहेत आणि आनंद साजरा करीत आहे. आणि त्या लोकांच्या बाबतीत जे त्यांना आतापर्यंत जाऊन मिळाले नाहीत त्यांच्यामागे आहेत[१], असे की, त्यांना कुठलेही भय नाही; आणि ते दु:खी पण होणार नाहीत (१७०)

يَسْتَبْشِرُوْنَ بِنِعْمَةٍ مِّنَ اللّٰهِ وَفَضْلٍ ۙ وَّاَنَّ اللّٰهَ لَا يُضِيْعُ اَجْرَ الْمُؤْمِنِيْنَ ۝١٧١

ते अल्लाहच्या देणग्यांवर आणि कृपेवर खूष आहेत, आणि यावर सुद्धा की, अल्लाहतआला ईमानवाल्यांचा मोबदला वाया जाऊ देत नसतो[२] (१७१)

اَلَّذِيْنَ اسْتَجَابُوْا لِلّٰهِ وَالرَّسُوْلِ مِنْۢ بَعْدِ مَآ اَصَابَهُمُ الْقَرْحُ ۛ لِلَّذِيْنَ اَحْسَنُوْا مِنْهُمْ وَاتَّقَوْا اَجْرٌ عَظِيْمٌ ۝١٧٢

ज्या लोकांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबरीच्या हुकूमाला मान्य केले; यानंतर की ते पूर्ण जखमी होऊन चुकले होते. याच्यातून ज्यांनी पुण्य केले, आणि सदाचरण आचरले त्यांच्यासाठी फार मोठा मोबदला आहे[३] (१७२)

اَلَّذِيْنَ قَالَ لَهُمُ النَّاسُ اِنَّ النَّاسَ قَدْ جَمَعُوْا لَكُمْ فَاخْشَوْهُمْ فَزَادَهُمْ اِيْمَانًا ۖ وَّقَالُوْا حَسْبُنَا اللّٰهُ وَنِعْمَ الْوَكِيْلُ ۝١٧٣

ते लोक की, ज्यांना लोकांनी सांगितले की, काफिरांनी तुमच्या विरोधांत सैन्य जमा करून ठेवले आहे; तुम्ही त्यांना भ्या. तर या गोष्टीने त्यांच्या ईमानांत आणखी भर टाकली आणि म्हणू लागले, आम्हास अल्लाह पुरेसा आहे आणि तो फार चांगला कैवारी आहे[४]. (१७३)

فَانْقَلَبُوْا بِنِعْمَةٍ مِّنَ اللّٰهِ وَفَضْلٍ لَّمْ يَمْسَسْهُمْ سُوْٓءٌ ۙ وَّاتَّبَعُوْا رِضْوَانَ اللّٰهِ ۗ وَاللّٰهُ ذُوْ فَضْلٍ عَظِيْمٍ ۝١٧٤

(परिणाम हा झाला) की, अल्लाहची देणगी आणि कृपेसह ते परत फिरले[५], त्यांना कसलाच अपाय झाला नाही. ते अल्लाहतआलाच्या मर्जीप्रमाणे वागले, अल्लाह फारच कृपानिधान आहे (१७४)

اِنَّمَا ذٰلِكُمُ الشَّيْطٰنُ يُخَوِّفُ اَوْلِيَآءَهٗ ۖ فَلَا تَخَافُوْهُمْ وَخَافُوْنِ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ۝١٧٥

ही बातमी देणारा फक्त शैतानच आहे, जो आपल्या मित्रांकडून भिववितो[६]. तुम्ही त्या काफिरांना भिऊ नका मला भ्या. जर तुम्ही मोमिन आहात[७] (१७५)

وَلَا يَحْزُنْكَ الَّذِيْنَ يُسَارِعُوْنَ فِى الْكُفْرِ ۚ اِنَّهُمْ لَنْ يَّضُرُّوا اللّٰهَ شَيْـًٔا ۗ يُرِيْدُ اللّٰهُ اَلَّا يَجْعَلَ لَهُمْ حَظًّا فِى الْاٰخِرَةِ ۚ وَلَهُمْ عَذَابٌ عَظِيْمٌ ۝١٧٦

कुफ्रमध्ये पुढे पुढे जाणाऱ्या लोकांमुळे तू दु:खी होऊ नकोस. विश्वास बाळगा की, हे अल्लाहतआलाचे काहीच बिघडवू शकत नाही. अल्लाहची तर ही इच्छा आहे की, त्यांना परलोकांत काही वाटा देऊ नये[८]. आणि त्यांच्याकरता कडक शिक्षा आहे (१७६)

१) म्हणजे ते इस्लामवाले, जे यांच्यानंतर जगांत जिवंत राहतात किंवा 'जिहाद' मध्ये व्यस्त आहेत त्यांच्या बाबतीत ते अशी इच्छा करतात की, त्यांनी सुद्धा 'शहीद' होऊन येथे आमच्यासारखे आनंदमय जीवन प्राप्त करावे. ओहुदच्या हुतात्म्यांनी अल्लाहतआलाच्या दरबारात अशी विनवणी केली की, आमचे ते मुसलमान बांधव जे दुनियेत जिवंत आहेत; त्यांना आमच्या स्थितीची आणि या आनंददायी जीवनाची खबर देणारा कोणी आहे? कारण की त्यांनी युद्ध व जिहादकडून तोंड न फिरवावे. अल्लाहतआलाने म्हटले मी तुमची ही गोष्ट त्यांच्यापर्यंत पोहचवून देतो. याच अनुषंगाने अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत केले (मुसनद अहमद, सुनन अबुदाऊद) याशिवाय अनेक हदीसींनी शहादतचे श्रेष्ठत्व सिद्ध आहे. उदा.एक हदीसीमध्ये सांगितले, ''कोणी मरण पावणारा जीव, ज्याला अल्लाहचे ठायी चांगले जीवन प्राप्त आहे. दुनियेत परतणे पसंत करीत नाही. तथापि शहीद, दुनियेत दुसऱ्यांदा येणे पंसत करतो. कारण की, तो दुसऱ्यादा अल्लाहच्या मार्गांत शहीद केला जावा. ही इच्छा तो यासाठी व्यक्त करतो की, त्याने शहादतचे श्रेष्ठत्व अनुभवले आहे.'' (मुसनद अहमद , सहीह मुस्लीम) ह.जाबिर رضي الله عنه म्हणतात की, मला रसूल ﷺ नी सांगितले, ''तुला ठाऊक आहे का? अल्लाहतआलाने तुझ्या वडीलांना जिवंत केले, आणि त्यांना सांगितले की, माझ्याजवळ आपली कोणी इच्छा जाहीर कर (की, मी तिला पूर्ण करावे) तुझ्या वडीलांनी उत्तर दिले की, माझी फक्त ही इच्छा आहे की, मला दुसऱ्यांदा जगांत पाठवून दिले जावे, कारण की, दुसऱ्यांदा तुझ्या मार्गात मारला जाऊ. अल्लाहतआलाने म्हटले हे तर शक्य नाही; यासाठी की हा माझा निर्णय आहे की, येथे आल्यानंतर कोणी दुनियेत

परत जाऊ शकत नाही.'' (मुसनद अहमद)
२) ही शुभसूचना पहिल्या शुभसूचनेची पुनरावृत्ती आणि या गोष्टीचे वर्णन आहे की त्यांचा आनंद केवळ भय आणि उदासीच्या कमी झाल्याने नाही किंबहुना अल्लाहच्या देणग्या आणि त्याच्या कल्पनेपेक्षा कितीतरी जास्त कृपा आणि दया पण आहेत आणि काही भाष्यकारांच्या म्हणण्यानुसार पहिल्या आनंदाचा संबंध जगांत राहून गेलेल्या बांधवांच्या कारणाने आणि दुसरा आनंद, बक्षीस आणि सन्मानचा आहे, जो अल्लाहतबारक तआलाकडून त्यांना मिळाला (फत्हुल कदीर)
३) जेव्हा मुशरीक अुहुदच्या लढाईहून फिरले तर रस्त्यांत ते विचार करू लागले की, आम्ही तर एक फार चांगली सुवर्णसंधी घालवली आहे. मुसलमान पराभव झाल्याच्या कारणाने निढाळ आणि भयग्रस्त होते. आम्हास यापासून फायदा घेऊन मदिनेवर भरपूर हल्ला केला पाहिजे होता. की इस्लामचा कोवळा अंकूर या जमिनीतून (मदिनेतून) नेस्तनाबूद होऊन जावा. इकडे मदिनेला पोहचून नबी ﷺ ना सुद्धा असे वाटले की, कदाचित् ते परत पलटून येतील. म्हणून आपण ﷺ नी सहाबा ﷺ ना पुन्हा लढण्यास तयार केले. आणि आपल्या ﷺ सांगण्यानुसार सहाबा ﷺ यावर सुद्धा की, आपल्या ठार झालेल्या आणि जखमी झालेल्या लोकांमुळे दु:खी व उदास होते; तयार झाले. मुसलमानांचा हा काफला जेव्हा मदिनेपासून आठ मैलाच्या अंतरावर असलेल्या 'हमराअल अ असद' ला पोहचला, तेव्हा मुशरिकांना भीती वाटली, म्हणून त्यांचा विचार बदलून गेला आणि ते मदिनेवर हल्ला करण्याऐवजी मक्केला परत चालले गेले. यानंतर नबी ﷺ आणि त्यांचे साथीदार पण मदिनेला परत आले. या महावाक्यात याच मुसलमानांच्या अल्लाह आणि रसूलच्या आज्ञापालनाच्या भावनेची प्रशंसा करण्यात आली आहे. काहींनी याच्या अवतरणाचे कारण ह.अबुसुफयानच्या या धमकीला दाखविले आहे, की येत्या वर्षी बद्रच्या दुसऱ्या युद्धांत तुमचा आमचा आमना सामना होईल (अबु सुफयान आतापर्यंत मुसलमान झालेले नव्हते) ज्यावर मुसलमानांनी सुद्धा अल्लाहच्या व रसूलच्या आज्ञापालनाचे प्रदर्शन करीत 'जिहाद' मध्ये भरपूर वाटा घेण्याचा निश्चय केला (फत्हुल कदीर, इब्ने कसीर) परंतु हे शेवटचे म्हणणे विषयाला अनुसरूण मेळ बसत नाही.
४) 'हमरा उल असद' आणि सांगण्यात येते की, बद्रे सुगराच्या वेळी, अबुसुफयानने काही लोकांच्या सेवा, आर्थिक मोबदला देऊन प्राप्त केल्या होत्या. आणि त्यांच्या मार्फत मुसलमानांमध्ये ही अफवा पसरविली की,मक्केचे मुशरिक युद्धासाठी भरपूर तयारी करीत आहेत, की हे ऐकूण मुसलमानांनी गलीत गात्र होऊन जावे. काही उल्लेखांनुसार हे काम शैतानाने आपल्या चेल्यांकडून करविले. परंतु मुसलमान या प्रकारच्या अफवा ऐकून भयग्रस्त होण्याऐवजी आणखी दृढनिश्चयाने आणि उत्साहाने ओतप्रोत होऊन गेले. ज्याला येथे ईमानाच्या अधिक्याने वर्णन करण्यांत आले आहे. कारण की ईमान जेवढे मजबूत असेल, 'जिहाद' चा इरादा आणि उत्साह पण तेवढाच जास्त राहील. हे महावाक्य याचा पुरावा आहे की, ईमान स्थिर प्रकारची वस्तू नाही, परंतु याच्यात कमी जास्त होत रहाते. जसे की मुहद्देसीन चे मत (मसलक) आहे. हे पण ठाऊक झाले की, संकटात पडले असतांना ईमानवाल्यांची पद्धत ही आहे की, ते अल्लाहवर पूर्ण विश्वास आणि भरोसा करतात. यासाठी हदीसमध्ये 'हसबुनल्लाहु व निअमल् वकील' म्हणण्याचे आलेले आहे. तसेच सहीह बुखारी वगैरेमध्ये आहे की, ह.इब्राहीम عليه السلام जेव्हा आगीत टाकण्यात आले, तेव्हा आपल्या जिभेवर हे शब्द होते. (फत्हुल कदीर)
५) नेअमतने (देणगीने) अभिप्रेत येथे सुरक्षितता व कृपेने अभिप्रेत तो नफा आहे. जो बद्रे सुगरामध्ये व्यापारामुळे प्राप्त झाला. नबी ﷺ नी बद्रे सुगरामध्ये एका (प्रवासांत) चालणाऱ्या काफल्याकडून व्यापारी माल खरीदी करून विक्री केला. ज्यामुळे नफा मिळाला. आणि आपण ﷺ नी मुसलमानांमध्ये वाटून टाकला (इब्ने कसीर)
६) म्हणजे तो तुम्हाला या भ्रमांत व वसवश्यांत टाकतो की, ते फार बलवान आणि मजबूत आहेत.
७) म्हणजे जेव्हा तो तुम्हाला भ्रमांत व्यस्त करेन तर तुम्ही माझ्यावरच भरोसा ठेवा, आणि माझ्याचकडे पलटा (म्हणजे गाऱ्हाणे करा.) मी तुम्हाला पुरेसा होऊन जाईन. आणि तुमचा मददगार राहीन. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले,''काय अल्लाहतआला आपल्या सेवकासाठी पुरेसा नाही.'' (सू. जुमर-३६) आणखी पहावे, ''कतबल्लाहू ल अगलीबन्न अना व रूसुली वगैरी हा मिनल आयात.''
८) नबी ﷺ च्या मनांत या गोष्टीची तिव्र इच्छा होती की, सर्व लोकांनी मुसलमान होऊन जावे; म्हणून नाकारण्याने आणि खोटे ठरविण्याने आपण ﷺ ला फार त्रास होत होता. अल्लाहतआलाने यांत आपले सांत्वन केले आहे की, आपण दु:खी होऊ नये. हे अल्लाहचे काही बिघडवू शकत नाही. ते आपलाच परलोक बर्बाद करीत आहे.

إِنَّ الَّذِينَ اشْتَرَوُا الْكُفْرَ بِالْإِيمَانِ لَن يَضُرُّوا اللَّهَ شَيْئًا ۖ وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١٧٧﴾

**कुफ्र ला ईमानच्या बदल्यात खरीदणारे कधीच कधीच अल्लाहतआलाला काही नुकसान पोहचवू शकत नाही. आणि यांच्याच करीता मोठी शिक्षा आहे. (१७७)**

وَلَا يَحْسَبَنَّ الَّذِينَ كَفَرُوا أَنَّمَا نُمْلِي لَهُمْ خَيْرٌ لِّأَنفُسِهِمْ ۚ إِنَّمَا نُمْلِي لَهُمْ لِيَزْدَادُوا إِثْمًا ۚ وَلَهُمْ عَذَابٌ مُّهِينٌ ﴿١٧٨﴾

**काफिर लोकांनी आम्ही दिलेल्या सवलतीला आपल्या संदर्भात उत्तम समजू नये; ही सवलत तर यासाठी आहे की, त्यांनी पापांमध्ये आणखी अग्रेसर व्हावे(१); यांच्याचकरिता अप्रतिष्ठीत करणाऱ्या शिक्षा आहेत (१७८)**

مَّا كَانَ اللَّهُ لِيَذَرَ الْمُؤْمِنِينَ عَلَىٰ مَا أَنتُمْ عَلَيْهِ حَتَّىٰ يَمِيزَ الْخَبِيثَ مِنَ الطَّيِّبِ ۗ وَمَا كَانَ اللَّهُ لِيُطْلِعَكُمْ عَلَى الْغَيْبِ وَلَٰكِنَّ اللَّهَ يَجْتَبِي مِن رُّسُلِهِ مَن يَشَاءُ ۖ فَآمِنُوا بِاللَّهِ وَرُسُلِهِ ۚ وَإِن تُؤْمِنُوا وَتَتَّقُوا فَلَكُمْ أَجْرٌ عَظِيمٌ ﴿١٧٩﴾

**ज्या अवस्थेत तुम्ही आहात यावर अल्लाहतआला ईमानवाल्यांना सोडून देणार नाही. जोपर्यंत पवित्र आणि अपवित्र यांना अलग अलग न करून टाकणार(२) आणि अल्लाहतआला असा ही नाही की, तुम्हाला अदृष्टाला सूचित करून देईन(३). परंतु अल्लाहतआला आपल्या पैगंबरापैकी ज्याला इच्छितो त्याला निवडून घेतो(४). यासाठी तुम्ही अल्लाहवर आणि त्याच्या रसूलवर ईमान ठेवा; जर तुम्ही ईमान आणाल आणि ईशभय बाळगाल तर तुमच्यासाठी मोठे प्रतिफळ आहे (१७९)**

१) यात अल्लाहतआलाच्या सवलत देण्याच्या कायद्याचे वर्णन आहे. म्हणजे अल्लाहतआला आपल्या चाणाक्ष वृत्ती आणि मर्जीप्रमाणे काफिरांना सवलत देत असतो. तात्कालिक स्वरूपात त्यांना ऐहिक सुबत्ता आणि संपन्नावस्थेने विपुलतेने आणि संपत्ती आणि संततीने संपन्न करतो. लोक समजतात की, त्यांच्यावर अल्लाहची कृपा होत आहे. परंतु अल्लाहच्या देणग्यांनी उपकृत होणारे पुण्य आणि अल्लाहच्या आज्ञापालनाचा मार्ग चोखळत नसतील तर या ऐहिक देणग्यात अल्लाहची कृपा नव्हे तर अल्लाहकडून सवलत आहे, ज्यामुळे यांच्या कुफ्र आणि आज्ञाभंजनात वाढच होते. सरशेवटी ते नरकाग्नीच्या कायमच्या शिक्षेला पात्र होतात. या विषयाला अल्लाहतआलाने आणखी अनेक ठिकाणी वर्णन केले आहे. उदा. ''काय ते ही अपेक्षा करतात की आम्ही यांच्या संपत्ती व संततीत वाढ करतो; हे आम्ही त्यांच्यासाठी चांगुलपणात शिघ्रता करीत आहोत? नाही; परंतु ते समजत नाहीत.'' (सू. मोमिनून -५५-५६)

२) यासाठी अल्लाह कसोटीच्या भट्टीतून जरूर पार पाडतो. कारण की त्याचे मित्र स्पष्ट होऊन जावेत. आणि शत्रू अप्रतिष्ठीत होऊन जावेत. विश्वासू सहनशील दांभिकांपासून वेगळे होऊन जावेत. ज्याप्रमाणे ओहुदमध्ये अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना आजमाविले; ज्यामुळे त्यांचे ईमान, सहनशिलता व दृढनिश्चय आणि आज्ञापालनाच्या भावनाचे प्रदर्शन झाले. आणि दांभिकांनी आपल्यावर जो दांभिकतेचा पर्दा टाकून ठेवला होता, तो उचलला गेला.

३) म्हणजे जर अल्लाहतआला अशा प्रकारे कसोटीच्या माध्यमातून लोकांची स्थिती आणि उघड आणि गुप्तला दृष्टीगोचर करणार नाही; तर तुमच्या जवळ अदृष्टाचे ज्ञान तर नाही, ज्यामुळे तुमच्यावर या गोष्टी जाहीर होऊन जाव्यात. आणि तुम्ही जाणून घ्यावे की, कोण दांभिक आहे आणि कोण शुद्ध मोमिन?

४) हं! तथापि अल्लाहतआला आपल्या पैगंबरांपैकी ज्याला इच्छिल त्याला अदृष्टाचे ज्ञान देतो; ज्यामुळे कधी कधी दांभिकांचा आणि त्यांच्या परिस्थितीचा आणि त्यांच्या कट कारस्थानाची गुप्तता जाहीर होऊन जाते. म्हणजे हे पण काही काही वेळेस आणि काही काही पैगंबरावरच जाहीर केले जाते. नाही तर सर्व साधारणपणे पैगंबर सुद्धा (जो पर्यंत अल्लाहतआला इच्छित नाही ) दांभिकांच्या आतील दांभिकत्व आणि त्यांच्या चालबाजीने अज्ञानांत (बेखबर) रहातो. (ज्याप्रमाणे सू.तौबाच्या आ. क्र.१०१ मध्ये अल्लाहतआला म्हणतो की,''अरब आणि मदिनावाल्यांमध्ये, जे दांभिक आहेत, हे पैगंबरा ! तुम्ही त्यांना ओळखत नाही. आम्ही त्यांना ओळखतो.'') याचा दुसरा अर्थ असा पण होऊ शकतो की, अदृष्टाचे ज्ञान आम्ही फक्त आमच्या पैगंबरानांच देत असतो. कारण की ही त्यांच्या नियोजनाची आवश्यकता आहे. या अल्लाहचे वह्य आणि अदृष्टाच्या हुकूमाचे मार्फतच ते लोकांना अल्लाहतआलाकडे बोलावितात आणि आपल्याला अल्लाहचे पैगंबर सिद्ध करतात. या विषयाला दुसऱ्या ठिकाणी असे वर्णन करण्यात आले आहे,''आलेमुल गैब (अल्लाहतआला आहे) आणि तो आपल्या अदृष्टांतून आवडत्या पैगंबरानाच अवगत करवितो'' (सू. जिन्न-२६-२७) उघड गोष्ट आहे , हे अदृष्ट आदेश तेच असतात, ज्यांचा संबंध पैगंबरीपद आणि त्या पदाची कर्तव्ये पालन करण्याशी असतो. आणि त्याच्याशी नाही. 'मा काना वमा यकुनु' (जे काही होऊन गेले, आणि पुढे कयामतपर्यंत होणार आहे.) चे ज्ञान. असे काही (अहले बातील) असत्यावर असणारे, या प्रकारचे अदृष्टाचे ज्ञान, पैगंबर लोकांसाठी आणि आपल्या 'अइम्मा मअसुमीन' साठी, असते, असे धरूण चालतात.

وَلَا يَحْسَبَنَّ الَّذِينَ يَبْخَلُونَ بِمَا آتَاهُمُ اللَّهُ مِن فَضْلِهِ هُوَ خَيْرًا لَّهُم ۖ بَلْ هُوَ شَرٌّ لَّهُمْ ۖ سَيُطَوَّقُونَ مَا بَخِلُوا بِهِ يَوْمَ الْقِيَامَةِ ۗ وَلِلَّهِ مِيرَاثُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ ۗ وَاللَّهُ بِمَا تَعْمَلُونَ خَبِيرٌ ﴿١٨٠﴾

**ज्यांना अल्लाहतआलाने आपल्या कृपेने काही देऊन ठेवले आहे. त्यांनी त्यात आपल्या कंजुषीला आपल्यासाठी चांगले न समजावे; उलट ती त्याच्यासाठी फारच वाईट आहे. लवकरच कयामतच्या दिवशी यांना आपल्या कंजुषीला वस्तूंचे मानखोडे घातले जातील[१]. आकाश आणि पृथ्वीची मिरास अल्लाहतआलाचीच आहे. आणि जे काही तुम्ही करीत आहात अल्लाहला ते सर्व माहित आहे. (१८०)**

لَّقَدْ سَمِعَ اللَّهُ قَوْلَ الَّذِينَ قَالُوا إِنَّ اللَّهَ فَقِيرٌ وَنَحْنُ أَغْنِيَاءُ ۘ سَنَكْتُبُ مَا قَالُوا وَقَتْلَهُمُ الْأَنبِيَاءَ بِغَيْرِ حَقٍّ وَنَقُولُ ذُوقُوا عَذَابَ الْحَرِيقِ ﴿١٨١﴾

**नि:संशय अल्लाहतआलाने त्या लोकांचे म्हणणे ऐकले,ज्यांनी म्हटले की, अल्लाहतआला तर फकीर आहे; आणि आम्ही श्रीमंत आहोत[२]. त्यांच्या या म्हणण्याला आम्ही लिहून घेऊ. आणि त्यांचे पैगंबरांना विनाकारण ठार करणे सुद्धा[३] आणि आम्ही त्यांना सांगू की जळणाऱ्या शिक्षेची मजा चाखा (१८१)**

ذَٰلِكَ بِمَا قَدَّمَتْ أَيْدِيكُمْ وَأَنَّ اللَّهَ لَيْسَ بِظَلَّامٍ لِّلْعَبِيدِ ﴿١٨٢﴾

**हा तुमच्या प्रस्तुत केलेल्या कर्मांचा मोबदला आहे. आणि अल्लाह आपल्या सेवकावर जुलूम करणार नाही (१८२)**

الَّذِينَ قَالُوا إِنَّ اللَّهَ عَهِدَ إِلَيْنَا أَلَّا نُؤْمِنَ لِرَسُولٍ حَتَّىٰ يَأْتِيَنَا بِقُرْبَانٍ تَأْكُلُهُ النَّارُ ۗ قُلْ قَدْ جَاءَكُمْ رُسُلٌ مِّن قَبْلِي بِالْبَيِّنَاتِ وَبِالَّذِي قُلْتُمْ فَلِمَ قَتَلْتُمُوهُمْ إِن كُنتُمْ صَادِقِينَ ﴿١٨٣﴾

**हे ते लोक आहेत की, जे म्हणतात की, अल्लाहतआलाने आम्हास हुकूम दिला आहे की, कोण्या पैगंबराला मानू नका; जोपर्यंत तो आमच्या समोर अशी कुरबानी आणणार नाही, जिला अग्नी खाऊन टाकेन. आपण सांगून टाका की, जर तुम्ही खरे आहात तर माझ्यापूर्वी तुमच्याजवळ जो पैगंबर इतर चमत्कारासहीत हा (चमत्कार) पण आणला, ज्याची तुम्ही मागणी करीत आहात, मग तुम्ही त्यांना का ठार मारले[४]? (१८३)**

१) याच्यात त्या कंजुष माणसाचे वर्णन करण्यात आले आहे, जो अल्लाहने दिलेल्या संपत्तीतून अल्लाहच्या मार्गात खर्च करीत नाही. येथ पावेतो की, याच्यातून फर्ज जकातपण काढत नाही. सहीह बुखारीच्या एका हदीसमध्ये येते की, कयामतच्या दिवशी त्यांच्या संपत्तीला एक विषारी आणि महाभयानक साप बनवून मानखोड्याप्रमाणे त्याच्या गळ्यात टाकून देण्यात येईल आणि तो साप त्याचा जबडा पकडून घेईल आणि म्हणेल मी तुझा माल आहे. मी तुझा खजिना आहे. (स. बुखारी)

२) जेव्हा अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याला प्रोत्साहीत केले आणि म्हटले, ''कोण आहे जो अल्लाहला चांगले कर्जे देईन?'' (सू. बकर:२४५) तर यहूद्यांनी म्हटले हे मोहम्मद ﷺ तुझा पालनकर्ता फकीर होऊन गेला आहे की, आपल्या सेवकांकडून कर्ज मागीत आहे? ज्यावर अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत केले (इब्ने कसीर)

३) म्हणजे चर्चीत म्हणणे, ज्यांत अल्लाहच्या दबदब्यात उद्धटपणा आहे आणि अशाच प्रकारे त्यांचे पैगंबर عليه السلام ना विनाकारण ठार करणे, याचे हे सर्व अपराध अल्लाहजवळ नोंदलेले आहेत. ज्यामुळे ते नरकाग्नीत प्रवेश करतील.

४) यात सुद्धा यहूद्यांच्या एका गोष्टीचे खंडन करण्यात येत आहे. ते म्हणत असत की, अल्लाहने आमच्या जवळून हे वचन घेतले आहे की, तुम्ही फक्त त्या पैगंबरांना मानावे, ज्याच्या प्रार्थनेवर आकाशातून अग्नीने यावे; आणि कुरबानी आणि सदकातला जाळून टाकावे. अर्थ हा होता की हे मोहम्मद! ﷺ आपल्याकडून याच चमत्काराचे प्रदर्शन झाले नाही म्हणून आम्हांस अल्लाहच्या हुकूमाप्रमाणे आपल्या पैगंबरीवर ईमान आणणे आवश्यक नाही. वास्तविक पहिल्या पैगंबरात असे पैगंबर पण आलेत, ज्यांच्या प्रार्थनेने आकाशातून अग्नी येऊन ईमानवाल्यांचे दानधर्म आणि कुरबानीला खाऊन टाके. जी एका दृष्टीने या गोष्टीचा पुरावा होता की, अल्लाहच्या मार्गात दिलेला दान धर्म किंवा कुरबानी अल्लाहजवळ मान्य करण्यात आली. दुसरीकडे हा या गोष्टीचा पुरावा होता की, हा पैगंबर सत्त्यावर आहे. परंतु या यहूद्यांनी त्या पैगंबरांना सुद्धा नाकारले होते. म्हणून अल्लाहतआलाने म्हटले, जर तुम्ही आपल्या दाव्यात खरे आहात, तर तुम्ही अशा पैगंबरांना का खोटे ठरविले आणि त्यांना ठार केले? जे तुमची वांच्छित निशाणीच घेऊन आले होते.

فَإِنْ كَذَّبُوكَ فَقَدْ كُذِّبَ رُسُلٌ مِّنْ قَبْلِكَ جَاءُو بِالْبَيِّنٰتِ وَالزُّبُرِ وَالْكِتٰبِ الْمُنِيْرِ ﴿١٨٤﴾

तरी सुद्धा हे लोक आपणांस खोटे ठरवतील, तर आपणापूर्वीसुद्धा पुष्कळशे ते पैगंबरपण खोटे ठरविले गेले आहेत, जे खुले चमत्कार, शास्त्रलेख आणि तेजपुंज पुस्तके घेऊन आलेत[१] (१८४)

كُلُّ نَفْسٍ ذَآئِقَةُ الْمَوْتِ ۗ وَإِنَّمَا تُوَفَّوْنَ أُجُوْرَكُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ ۖ فَمَنْ زُحْزِحَ عَنِ النَّارِ وَأُدْخِلَ الْجَنَّةَ فَقَدْ فَازَ ۗ وَمَا الْحَيٰوةُ الدُّنْيَآ إِلَّا مَتَاعُ الْغُرُوْرِ ﴿١٨٥﴾

प्रत्येक जीव मृत्यूची मजा चाखणार आहे. आणि कयामतच्या दिवशी तुम्हांस आपले मोबदले पुरे पुरे दिले जातील. मग जो मनुष्य अग्नीपासून हटवून दिला जाईल आणि स्वर्गात दाखल करून दिला जाईल नि:संशय तो सफल होऊन गेला आणि ऐहिक जीवन तर केवळ फसवणूकीचे साधन आहे[२]. (१८५)

لَتُبْلَوُنَّ فِيْٓ أَمْوَالِكُمْ وَأَنْفُسِكُمْ ۗ وَلَتَسْمَعُنَّ مِنَ الَّذِيْنَ أُوْتُوا الْكِتٰبَ مِنْ قَبْلِكُمْ وَمِنَ الَّذِيْنَ أَشْرَكُوْٓا أَذًى كَثِيْرًا ۗ وَإِنْ تَصْبِرُوْا وَتَتَّقُوْا فَإِنَّ ذٰلِكَ مِنْ عَزْمِ الْأُمُوْرِ ﴿١٨٦﴾

खचितच् तुमच्या संपत्तीत आणि तुमच्या जीवांत तुमची परीक्षा घेतली जाईल[३]. आणि हे पण निश्चित आहे. की तुम्हास त्या लोकांची ज्यांना तुमच्या पूर्वी पुस्तक देण्यात आले, आणि मुशरिकांच्या पुष्कळशा दु:ख देणाऱ्या गोष्टीपण ऐकाव्या लागतील आणि तुम्ही धैर्य बाळगाल आणि सदाचरण आचराल तर खचितच् हे मोठे हिंमतीचे कामे आहेत[४] (१८६)

१) नबी ﷺ चे सांत्वन करण्यात येत आहे, की आपण ﷺ नी यहूद्यांच्या अशा गोष्टीपासून हवालदिल होऊ नये; असा मामला फक्त आपल्या बरोबर केला जात नाही, तर आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या पैगंबराबरोबर पण हेच सर्व काही होऊन चूकले आहे.

२) या महावाक्यात एक तर त्या अटळ सत्याचे वर्णन आहे, की मृत्यूपासून कोणाला ही पळ काढता येणार नाही. दुसरे असे की, या जगांत ज्याने चांगले किंवा वाईट जे काही केले असेल, त्याला याचा पुरेपूर मोबदला दिला जाईल. तिसरे असे यशाची कसोटी दाखविण्यात आली आहे की, सफल वास्तविक तो आहे, ज्याने जगांत राहून पालनकर्त्याला राजी करून घेतले, ज्याच्या परिणांमात तो नरकाग्नी पासून दूर आणि स्वर्गात दाखल करून दिला गेला. चौथे असे की, या जगातील जीवन फसवणूकीचे साधन आहे. जो यापासून अलिप्त होऊन निघून गेला, तो भाग्यवान आणि जो याच्या मोहजालात फसून गेला तो अयशस्वी आणि आपल्या इच्छेला न पावणारा आहे.

३) ईमानवाल्यांना त्यांच्या ईमानाबाबत आजमाविण्याचे वर्णन आहे. जसे की, सू.बकर: च्या आयत क्र.१५५ मध्ये येऊन चुकले. या महावाक्याच्या भाष्यांत एक घटना पण येते की, दांभिकांचा सरदार अब्दुल्लाह बिन उबई ने आतापर्यंत इस्लाम कबूल केल्याचे जाहीर केले नव्हते, आणि बद्रचे युद्धपण झाले नव्हते की, नबी ﷺ ह.सआद बिन अुबादा ﷺ ची वास्तपुस करण्यासाठी बनी हारीस बिन खजरज मध्ये गेले. मार्गात एका बैठकीत मुशरिक यहूदी आणि अब्दुल्लाह बिन उबई वगैरे बसले होते. आपल्या स्वारी पासून जी धूळ उडाली, त्याने यावर पण नाराजी व्यक्त केली. आपण ﷺ नी थांबून त्यांना इस्लामचे आवाहन केले. ज्यावर अब्दुल्लाह बिन उबईने उद्धट शब्द पण उच्चारले. तेथे काही मुसलमान पण होते. त्यांनी याउलट आपले प्रशंसा केली शक्यता होती की, त्यांच्यात झगडा झाला असता, आपण ﷺ नी त्यांना चूप केले. मग आपण ﷺ ह.साद ﷺ जवळ पोहचले. त्यांनापण ही घटना ऐकविली. त्यावर त्यांनी म्हटले की, अब्दुल्लाह बिन उबई या गोष्टी यासाठी करतो की, आपण मदिनेला येण्यापूर्वी येथील रहिवाशी त्याला मुकुटधारण करून देणार होते. आपण ﷺ च्या येण्याने त्याचे हे सोनेरी स्वप्न अपूर्ण राहून गेले, ज्याचे त्याला तिव्र दु:ख आहे. म्हणून त्याच्या या गोष्टी याच द्वेष आणि वंश श्रेष्ठत्वाचे प्रदर्शन आहे. म्हणून आपण त्यांना दुर्लक्षित करावे (सहीह बुखारी)

४) ग्रंथधारी लोकांनी अभिप्रेत यहूदी आणि खिस्ती आहेत. हे नबी ﷺ, इस्लाम आणि मुसलमानांच्या विरुद्ध वेगवेगळ्या प्रकारे टोमणे मारत असता, याच प्रमाणे अरबच्या बहुदेववाल्यांची पण अवस्था होती. या शिवाय मदिनेत आल्यानंतर दांभिक आणि विशेष करून त्यांचा सरदार अब्दुल्लाह बिन उबई पण, आपल्या संदर्भात निंदाव्यंजक शब्द उच्चारत असे. आपण ﷺ मदिनेला येण्यापूर्वी त्याला आपला सरदार बनविणार होते. आणि त्याच्या मुकुटधारणाची सर्व तयारी पूर्ण झाली होती की, आपल्या ﷺ आगमणामुळे याचे हे सर्व स्वप्न भंगून गेले. ज्याचे याला तीव्र दु:ख होते. म्हणून बदला घेण्याच्या भावनेने आपल्यावर ﷺ शरसंधान करण्याची कुठलीही संधी तो वाया घालवित नसे. जसे की, सही बुखारीच्या हवाल्याने याचा जरूरी तपशील मागे गेलेल्या समासांतच वर्णन करण्यातआला आहे. या परिस्थितीत मुसलमानांना क्षमा व दुर्लक्ष, सहनशिलता आणि ईशभय अंगिकारण्याचे सांगण्यात येत आहे. ज्यामुळे ठाऊक झाले की, सत्त्याचे आवाहन करणाऱ्यांचा त्रास आणि संकटांचा सामना करणे, या सत्त्याचा मार्ग (चोखाळणाऱ्या) टाळता न येणाऱ्या टप्प्यांपैकी आहे. आणि याचा उपाय अल्लाहसाठी सहन करणे, अल्लाहकडून मदत मागणे आणि अल्लाहकडे वळणे याशिवाय काहीही नाही. (इब्ने कसीर)

وَإِذْ أَخَذَ اللَّهُ مِيثَاقَ الَّذِينَ أُوتُوا الْكِتَابَ لَتُبَيِّنُنَّهُ لِلنَّاسِ وَلَا تَكْتُمُونَهُ فَنَبَذُوهُ وَرَاءَ ظُهُورِهِمْ وَاشْتَرَوْا بِهِ ثَمَنًا قَلِيلًا ۖ فَبِئْسَ مَا يَشْتَرُونَ ﴿١٨٧﴾

**आणि जेव्हा अल्लाहतआलाने ग्रंथधारी लोकांकडून वचन घेतले, की जरूर त्याला (ग्रंथ) सर्व लोकांना अवश्य वाचून दाखवाल आणि त्याला लपविणार नाही. तेव्हा यावर सुद्धा त्यांनी या वचनाला आपल्यापाठीमागे टाकून दिले; आणि त्याला अत्यल्प किंमतीला विकून टाकले, यांचा हा व्यापार फारच वाईट आहे[१] (१८७)**

لَا تَحْسَبَنَّ الَّذِينَ يَفْرَحُونَ بِمَا أَتَوا وَّيُحِبُّونَ أَن يُحْمَدُوا بِمَا لَمْ يَفْعَلُوا فَلَا تَحْسَبَنَّهُم بِمَفَازَةٍ مِّنَ الْعَذَابِ ۖ وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١٨٨﴾

**ते लोक, जे आपल्या कर्तृत्वावर फार आनंदित आहे. आणि इच्छितात की, जे त्यांनी केले नाही; त्यावर सुद्धा त्यांची प्रसंशा केली जावी; आपण त्यांना शिक्षेतून मुक्त झालेले समजू नये, त्यांच्यासाठी तर यातनादायक शिक्षा आहे[२]. (१८८)**

وَلِلَّهِ مُلْكُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ ۗ وَاللَّهُ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿١٨٩﴾

**आकाश आणि पृथ्वीचे राज्य अल्लाहचेच आहे. आणि अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे. (१८९)**

إِنَّ فِي خَلْقِ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ وَاخْتِلَافِ اللَّيْلِ وَالنَّهَارِ لَآيَاتٍ لِّأُولِي الْأَلْبَابِ ﴿١٩٠﴾

**आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीत आणि रात्र व दिवसाच्या हेरफेरामध्ये खचितच् बुद्धीवंतांसाठी निशाण्या आहेत[३] (१९०)**

१) यात ग्रंथधारी लोकांची कानउघाडणी केली जात आहे की, अल्लाहने त्यांच्याकडून हे वचन घेतले होते की, अल्लाहच्या पुस्तकामध्ये (तौरात आणि इंजील) ज्या गोष्टी नमूद आहेत. आणि शेवटच्या पैगंबराची जी वैशिष्टये आहेत, त्यांना लोकांसमोर वर्णन करावे; आणि त्यांना लपविणार नाही, परंतु या लोकांनी थोड्याशा ऐहिक फायद्यासाठी, अल्लाहच्या या वचनाला पाठीमागे टाकून दिले. ही जणू ज्ञानी लोकांना समज आणि तंबी आहे, ती त्यांच्याजवळ जे फायदा देणारे ज्ञान आहे, ज्याच्यामुळे लोकांच्या श्रद्धेत आणि कर्मात सुधारणा होण्याची शक्यता आहे, ते लोकांजवळ अवश्य पोहचविले पाहिजे आणि ऐहिक गरजा आणि फायद्यासाठी त्यांना लपविणे फार मोठा अपराध आहे. कयामतच्या दिवशी अशा लोकांना अग्नीची लगाम घालण्यात येईल (कमा फिल हदीस)

२) यात अशा लोकांसाठी कडक तंबी आहे की, जे आपल्या केलेल्या कर्तृत्वावरच आनंदित होत नाहीत, परंतु असे इच्छितात की, त्यांच्या खात्यात ते कारनामे पण शामील केले जावेत किंवा जाहीर केले जावेत; जे त्यांनी केलेले नसतात. हा रोग ज्याप्रमाणे पैगंबर साहेबांच्या ﷺ काळात काही लोकांमध्ये होता, ज्याला अनुलक्षून या महावाक्याचे अवतरण झाले; त्याचप्रमाणे आजसुद्धा वाहव्वा चाहणारे काही लोक आणि प्रोपेगंडा आणि इतर कपट्याच्या मुळे बनणाऱ्या पुढाऱ्यांमध्ये हा रोग सर्वसाधारण आहे. अअजनल्लाहु मिनहू. महावाक्याच्या अनुषंगाने हे पण ठाऊक होते की, यहूदी अल्लाहच्या पुस्तकांत फेरबदल आणि लपवालपवी करण्याचे अपराधी होते. परंतु आपल्या या कर्तृत्वावर आनंदित होत असत. हीच परिस्थिती आजच्या असत्यावर असलेल्या समूहाची आहे. ते सुद्धा लोकांना मार्गभ्रष्ट करून चुकीचे मार्गदर्शन करून आणि अल्लाहच्या महावाक्यांत अर्थाच्या दृष्टीने हेरफेर व फसवणूक करून खूपच खूष होतात. आणि दावा हा करतात की, ते सत्त्यावर आहेत. आणि त्यांच्या या धोका देण्याची वाहव्वा केली जावी. ''कातलहुमुल्लाहू अन्ना युअफकून''

७) म्हणजे जे लोक पृथ्वी व आकाशाची निर्मिती आणि विश्वाच्या दुसऱ्या रहस्यांवर चिंतन करतात त्यांना विश्वाचा निर्माता आणि खरा बादशाहचे ज्ञान प्राप्त होते आणि ते समजून जातात की इतक्या विशाल (लांब व रूंद) विश्वाची ही सुनियोजित व्यवस्था ज्यात जरा सुद्धा अडचण येत नाही. नक्कीच याच्या मागे एक व्यक्तीत्व आहे जे याला चालवत आहे. आणि याची युक्ती प्रयुक्ती करीत आहे. आणि ते व्यक्तीत्व आहे अल्लाह! पुढे याच समजदार लोकांच्या वैशिष्ट्यांचे वर्णन आहे की, ते उठता बसतांना आणि कुशीवर झोपतांना अल्लाहचे स्मरण करतात. हदीसमध्ये येते, ''इन्न फी खलकस्समावाती'' यापासून सूरहच्या शेवटपर्यंत, हे महावाक्य नबी करीम ﷺ जेव्हा रात्री तहज्जुदसाठी उठत तेव्हा पठन करत आणि त्यानंतर वजू करीत (सहीह बुखारी व सही मुस्लीम)

الَّذِيْنَ يَذْكُرُوْنَ اللّٰهَ قِيٰمًا وَّ قُعُوْدًا وَّ عَلٰى جُنُوْبِهِمْ وَيَتَفَكَّرُوْنَ فِيْ خَلْقِ السَّمٰوٰتِ وَ الْاَرْضِ ۚ رَبَّنَا مَا خَلَقْتَ هٰذَا بَاطِلًا ۚ سُبْحٰنَكَ فَقِنَا عَذَابَ النَّارِ ﴿١٩١﴾

**जे अल्लाहतआलाचे स्मरण उभे आणि बसलेले आणि आपल्या कुशीवर झोपताना करत असतात आणि आकाशांच्या आणि पृथ्वीच्या निर्मितीत चिंतन मनन करत असतात आणि म्हणतात की, हे आमच्या पालनकर्त्या! तू हे निरर्थक (तर) बनविले नाहीस, तू पवित्र आहेस. तू आम्हास अग्नीच्या शिक्षेपासून वाचवून घे[१] (१९१)**

رَبَّنَا اِنَّكَ مَنْ تُدْخِلِ النَّارَ فَقَدْ اَخْزَيْتَهٗ ؕ وَ مَا لِلظّٰلِمِيْنَ مِنْ اَنْصَارٍ ﴿١٩٢﴾

**हे आमच्या पालनकर्त्या! तू ज्याला नरकाग्नीत टाकशील खचितच तू त्याला फारच लाजविलेस आणि जालिमांचा कोणी मदतगार नाही (१९२)**

رَبَّنَآ اِنَّنَا سَمِعْنَا مُنَادِيًا يُّنَادِيْ لِلْاِيْمَانِ اَنْ اٰمِنُوْا بِرَبِّكُمْ فَاٰمَنَّا ۖ رَبَّنَا فَاغْفِرْ لَنَا ذُنُوْبَنَا وَكَفِّرْ عَنَّا سَيِّاٰتِنَا وَ تَوَفَّنَا مَعَ الْاَبْرَارِ ﴿١٩٣﴾

**हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही ऐकले की, एक हाक मारणारा मोठ्या आवाजाने ईमानाकडे बोलावीत आहे की, लोकांनो! आपल्या पालनकर्त्यावर ईमान आणा. बस मग आम्ही ईमान आणले. हे आमच्या पालनकर्त्या! आता तू आमचे अपराध क्षमा कर. आणि आमच्या वाईट गोष्टी आमच्या पासून दूर कर. आणि आमचा मृत्यू पुण्यवान लोकांबरोबर कर (१९३)**

رَبَّنَا وَ اٰتِنَا مَا وَعَدْتَّنَا عَلٰى رُسُلِكَ وَلَا تُخْزِنَا يَوْمَ الْقِيٰمَةِ ؕ اِنَّكَ لَا تُخْلِفُ الْمِيْعَادَ ﴿١٩٤﴾

**हे आमच्या पाळणाऱ्या उपास्या! आम्हास ते दे, ज्याचा वायदा तू आपल्या पैगंबरांच्या जबानी केला आहे आणि आम्हास कयामतच्या दिवशी लज्जीत करू नकोस. खचितच् तू आपल्या वायद्याच्या विरूद्ध करीत नसतो (१९४)**

فَاسْتَجَابَ لَهُمْ رَبُّهُمْ اَنِّيْ لَآ اُضِيْعُ عَمَلَ عَامِلٍ مِّنْكُمْ مِّنْ ذَكَرٍ اَوْ اُنْثٰى ۚ بَعْضُكُمْ مِّنْۢ بَعْضٍ ۚ فَالَّذِيْنَ هَاجَرُوْا وَ اُخْرِجُوْا مِنْ دِيَارِهِمْ وَ اُوْذُوْا فِيْ سَبِيْلِيْ وَ قٰتَلُوْا وَ قُتِلُوْا لَاُكَفِّرَنَّ عَنْهُمْ سَيِّاٰتِهِمْ وَ لَاُدْخِلَنَّهُمْ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ ۚ ثَوَابًا مِّنْ عِنْدِ اللّٰهِ ؕ وَ اللّٰهُ عِنْدَهٗ حُسْنُ الثَّوَابِ ﴿١٩٥﴾

**बस, मग त्याच्या पालनकर्त्याने त्यांची प्रार्थना मान्य केली की[२], तुमच्यातून कोण्या कर्म करणाऱ्याचे कर्म, मग तो पुरूष असो किंवा स्त्री मी वाया घालत नसतो[३]. तुम्ही आपसांत एकच जात आहात[४]; म्हणून ज्या लोकांनी हिजरत केली आणि आपल्या घरादारातून काढून देण्यात आले, आणि ज्यांना माझ्या मार्गात त्रास देण्यात आला आणि ज्यांनी जिहाद केले, आणि 'शहीद' करण्यात आलेत, मी अवश्य अवश्य त्यांच्या वाईट गोष्टी त्यांच्यापासून दूर करून टाकीन, आणि खात्रीपूर्वक त्यांना त्या स्वर्गात घेऊन जाईन ज्यांच्या खाली पाण्याचे पाट वाहत आहेत, हा आहे अल्लाहकडून मोबदला आणि अल्लाहतआलाजवळच उत्कृष्ट मोबदला आहे. (१९५)**

لَا يَغُرَّنَّكَ تَقَلُّبُ الَّذِيْنَ كَفَرُوْا فِي الْبِلَادِ ﴿١٩٦﴾

**तुम्हास काफिरांचे शहरात मिरवत फिरण्याने धोक्यात टाकू नये[५] (१९६)**

مَتَاعٌ قَلِيْلٌ ۟ ثُمَّ مَاْوٰىهُمْ جَهَنَّمُ ؕ وَبِئْسَ الْمِهَادُ ﴿١٩٧﴾

**हा तर फारच थोडा फायदा आहे[६]. याच्यानंतर तर यांचे ठिकाण नरकाग्नी आहे आणि ती फार वाईट जागा आहे. (१९७)**

१) या दहा महावाक्यातून पहिल्या महावाक्यात अल्लाहतबारकवतआलाने आपल्या सामर्थ्य आणि शक्तीच्या काही निशाण्या वर्णन केल्या आहेत आणि सांगितले की, या निशाण्या जरूर आहेत, पण कोणासाठी? बुद्धी आणि समज बाळगणाऱ्यांसाठी. याचा अर्थ असा झाला की, या विलक्षण निर्मिती आणि अल्लाहच्या सामर्थ्याला पाहून सुद्धा ज्या मनुष्याला अल्लाहतआलाची ओळख होणार नाही, तो समजुतदारच नाही. परंतु ही शोकांतिकापण मोठी विचित्र आहे. की इस्लामी जगतात बुद्धीमान त्यालाच समजण्यात येते जो अल्लाहतआलाच्या बाबतीत शंकाकुशंका व्यक्त करीत असेल. ''फइन्नालिल्लाहे व इन्ना इलैहै राजेऊन'' दुसऱ्या महावाक्यांत बुद्धीमानांचे अल्लाहचे नामस्मरण करण्याची आवड आणि त्याचे आकाश पृथ्वीच्या निर्मितीत चिंतन करण्याचे वर्णन आहे. जसे की, हदीसमध्ये पण येते, ''नबी करीम ﷺ नी म्हटले, ''उभे राहून नमाज पढा. जर उभे राहून पढता येत नसेल तर बसून आणि बसूनही पढू शकत

नसाल तर कुशीवर झोपल्या झोपल्याच नमाज पढून घ्या.'' (सहीह बुखारी) असे लोक जे नेहमी अल्लाहचे स्मरण करतात, आणि आकाश व पृथ्वीच्या निर्मितीत आणि त्यांच्या युक्तीप्रयुक्तीत चिंतन करतात, ज्यामुळे या विश्वाच्या निर्मात्याचे मोठेपण आणि सामर्थ्य त्याचे ज्ञान आणि अधिकार आणि त्याची दया आणि स्वामित्व याची खरी ओळख त्यांना होते. तेव्हा ते अनपेक्षित म्हणतात की, विश्वाच्या स्वामीने हे विश्व असेच निरूद्देश बनविले नाही. परंतु याचा उद्देश सेवकांची परीक्षा आहे. जो परीक्षेत उत्तीर्ण होऊन गेला त्याच्यासाठी चिरकालीन स्वर्गाच्या देणग्या आहेत. आणि जो अनुत्तीर्ण झाला, त्याच्या करता अग्नीची शिक्षा आहे. याकरीता ते आगीच्या शिक्षेपासून वाचण्याची प्रार्थनापण करत असतात. याच्यानंतरच्या तीन महावाक्यांत सुद्धा क्षमायाचना आणि कयामतच्या दिवसाचे लज्जीत होणे, यापासून वाचण्यासाठी प्रार्थना आहेत.

२) 'फस्तजाबा' येथे 'अजाबा' म्हणजे ''मान्य केले'' च्या अर्थात आहे. (फत्हुल कदीर)

३) पुरूष असो वा स्त्री चे स्पष्टीकरण यासाठी करून दिले की, इस्लामने काही बाबीत पुरूष व स्त्रियांच्या मध्ये त्यांच्या एक दुसऱ्याच्या वेगवेगळ्या नैसर्गिक वैशिष्टांमुळे जो फरक करण्यात आला आहे उदा. पुरूषाला स्त्रीवर जे वरचढत्व देण्यात आले आहे त्यांत, अधिकाराची पदे यांच्यात रोजी कमविण्याच्या जबाबदारीमध्ये, 'जिहाद' मध्ये भाग घेण्यात आणि वारसा हक्कात अर्धावाटा मिळण्यात याच्याने हे न समजण्यात यावे की, पूण्य कर्मांच्या मोबदल्यात कदाचित् पुरूष आणि स्त्रीच्या दरम्यान काही फरक केला जाईल; नाही असे होणार नाही. परंतु प्रत्येक पुण्याचा जो मोबदला जो एका पुरूषाला मिळेल, ते पुण्य जर एक स्त्री करेल, तर तिला सुद्धा तोच मोबदला मिळेल.

४) याचा उद्देश मागच्या मुद्याचेच स्पष्टीकरण करणे आहे; म्हणजे मोबदला आणि आज्ञापालनांत तुम्ही पुरूष आणि स्त्रिया एकच आहात. म्हणजे एक सारखेच आहात. काही उल्लेखांत आहे की, ह. उम्मे सलमा ﵂ नी एकदा अर्ज केला की, हे रसूलुल्लाह ﷺ अल्लाहतआलाने हिजरतच्या संदर्भात स्त्रियांचा उल्लेख केला नाही; ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले. (तफसीर तबरी, इब्ने कसीर व फत्हुल कदीर)

५) उद्देशून जरी नबी ﷺ ला आहे. परंतु उद्देश संपूर्ण उम्मत आहे. शहरात चालण्याफिरण्याने अभिप्रेत व्यापार आणि व्यवहार करीता एका शहरातून दुसऱ्या शहरात, एका देशातून दुसऱ्या देशात जाणे आहे. हा व्यापारी प्रवास ही ऐहिक समृद्धतेची आणि व्यवहाराची विशालता आणि उर्जिता व्यवस्थेचा पुरावा असतो. अल्लाहतआलाचे म्हणणे आहे की, हे सर्व तात्कालिक आणि थोड्या दिवसांचा फायदा आहे. यांत ईमानवाल्यांनी फसगतीत पडू नये. खऱ्या परिणामावर दृष्टी ठेवावयाला पाहिजे. जो ईमान नसल्यास नरकाग्नीची कायम स्वरूपी शिक्षा आहे. ज्यात ऐहिक ऐश्वर्याने संपन्न हे काफिर दाखल होतील. हा विषय आणखी पण निरनिराळ्या ठिकाणी वर्णन करण्यात आला आहे. उदा. ''अल्लाहच्या महावाक्यात तेच लोक वितंडवाद करतात, जे काफिर आहेत, बस त्यांचे शहरात चालणे फिरणे तुम्हास फसगतीत टाकू नये;'' (सू. मोमिन -४)''नि:संशय जे लोक अल्लाहवर खोटा आळ घेतात, ते यशस्वी होणार नाहीत. हे या जगांत थोडेसे सुख समाधान आहे. मग त्यांना आमचेकडे परतून येणे आहे.'' (सू. यूनुस - ६९-७०), ''आम्ही त्यांना असाच काही (थोडासा) फायदा पोहचवू परंतु सरते शेवटी आम्ही त्यांना फारच केविलवाण्या स्थितीत सक्त शिक्षेकडे परतून घेऊन जाऊ'' (सू. लुकमान-२४)

६) म्हणजे जगाची निवास व शोभा शृंगार आणि सवलती उघडरित्या किती का जास्त असेना; वास्तविक थोडीशीच मालमत्ता आहे; कारण की सरतेशेवटी त्यांना नष्ट होणे आहे आणि यांच्या नष्ट होण्यापूर्वी त्या व्यक्ती स्वत: सुद्धा नष्ट होऊन जातील, ज्यांनी यांना प्राप्त करण्याच्या प्रयत्नांत अल्लाहला पण विसरून गेले होते आणि सर्व प्रकारच्या चारित्र्यविषयक दस्तुर आणि अल्लाहच्या बांधीव मर्यादांना पायदळी तुडवतात.

لٰكِنِ الَّذِيْنَ اتَّقَوْا رَبَّهُمْ لَهُمْ جَنّٰتٌ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا نُزُلًا مِّنْ عِنْدِ اللّٰهِ ؕ وَمَا عِنْدَ اللّٰهِ خَيْرٌ لِّلْاَبْرَارِ ﴿١٩٨﴾

**परंतु जे लोक आपल्या पालनकर्त्याला भितात, त्यांच्यासाठी स्वर्गाच्या बागा आहेत; ज्यांच्याखाली पाण्याचे पाट वहात आहेत; त्यात ते नेहमी राहतील. हा पाहुणचार आहे अल्लाहकडून आणि सदाचरणी लोकांसाठी जे काही अल्लाहतआलाजवळ आहे, ते फारच उत्कृष्ट आहे[१] १९८**

وَاِنَّ مِنْ اَهْلِ الْكِتٰبِ لَمَنْ يُّؤْمِنُ بِاللّٰهِ وَمَاۤ اُنْزِلَ اِلَيْكُمْ وَمَاۤ اُنْزِلَ اِلَيْهِمْ خٰشِعِيْنَ لِلّٰهِ ۙ لَا يَشْتَرُوْنَ بِاٰيٰتِ اللّٰهِ ثَمَنًا قَلِيْلًا ؕ اُولٰٓئِكَ لَهُمْ اَجْرُهُمْ عِنْدَ رَبِّهِمْ ؕ اِنَّ اللّٰهَ سَرِيْعُ الْحِسَابِ ﴿١٩٩﴾

**खचितच् ग्रंथधारी लोकांमधून काही असे पण आहेत, जे अल्लाहवर ईमान आणतात; आणि तुमच्यावर जे उतारण्यात आले आहे, आणि त्यांच्याकडे जे अवतरीत झाले, त्यावर सुद्धा, अल्लाहतआलाला भितात; आणि अल्लाहच्या महावाक्यांना अत्यल्प किंमतीत विकतपण नाहीत[२]; त्याचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी आहे; खचितच् अल्लाहतआला जलद हिशेब घेणारा आहे १९९**

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اصْبِرُوْا وَصَابِرُوْا وَرَابِطُوْا ۟ وَاتَّقُوا اللّٰهَ لَعَلَّكُمْ تُفْلِحُوْنَ ﴿٢٠٠﴾

**हे ईमानवाल्यांनो! तुम्ही दृढ जमून[३] रहा. आणि एक दुसऱ्याला बळकट धरून रहा. आणि 'जिहाद' करण्यासाठी तयार रहा. आणि अल्लाहला भित रहा. कारण की तुम्ही आपल्या मनोरथात सफल व्हावे २००**

१) याच्या उलट जे सदाचरण आणि ईशभयाचे जीवन व्यतीत करून अल्लाहच्या दरबारात हजर होतील, जरी त्यांच्या जवळ या जगांत अल्लाहला विसरून जाणाऱ्यांप्रमाणे धनाचे साठे आणि उपजिवीकेची विपुलता राहिली नसेल, परंतु ते अल्लाहचे अतिथी असतील जो सर्व विश्वाचा निर्माता आणि मालक आहे. आणि तेथे या पुण्यवान लोकांना जे प्रतिफळ आणि मोबदला मिळेल तो याच्यापेक्षा फार उत्तम असेल; जो जगांत काफिरांना तात्कालीकरित्या मिळतो.

२) या महावाक्यांत ग्रंथधारी लोकांच्या त्या समूहाचा उल्लेख आहे, ज्याला रसूले करीम ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणण्याची प्रतिष्ठा लाभली. त्यांचे ईमान आणि ईमानी वैशिष्ट्यांचा उल्लेख करून, अल्लाहतआलाने त्यांना दुसऱ्या ग्रंथधारी लोकांपेक्षा वेगळे करून टाकले, ज्यांचे मिशन इस्लाम, इस्लामचे पैगंबर आणि मुसलमानांच्या विरोधात कारस्थाने करणे, अल्लाहच्या महावाक्यात हेरफेर आणि बदल करणे आणि ऐहिक, तात्कालिक आणि क्षणभंगुर फायद्यांकरीता खऱ्या ज्ञानाला लपविणे, हे होते. अल्लाहतआलाने म्हटले, हे ग्रंथधारी मोमिन लोक असे नाहीत; परंतु हे लोक अल्लाहला भिणारे आहेत. अल्लाहच्या महावाक्यांना अत्यल्प किंमतीत विकणारे नाहीत. याचा अर्थ असा झाला की, जे धर्मपंडित आणि बुजुर्ग ऐहिक फायद्यासाठी अल्लाहच्या महावाक्यांत हेरफेर किंवा त्यांच्या विषयांच्या वर्णनात फसवणूकीचे आणि लबाडीचे काम करतात ते ईमान आणि ईशभयाने रिक्त आहेत. हाफीज इब्ने कसीर लिहितात, या वाक्यांत ज्या मोमिन ग्रंथधारी लोकांचा उल्लेख आहे, यहूद्यांमधून त्यांची संख्या दहा पर्यंतपण पोहचत नाही; तथापि ख्रिस्ती मोठ्या संख्येत मुसलमान झालेत आणि त्यांनी सत्य धर्माला अंगिकारले. (तफसीर इब्ने कसीर)

३) सहनशील व्हा, म्हणजे आज्ञापालनाचा अंगिकार करणे आणि वासना आणि लज्जतींना सोडून देण्यात मनाला मजबूत आणि दृढनिश्चयी ठेवा.''मुसाबरा'' (साबरू) युद्धाच्या तिव्रतेत, शत्रुच्या विरोधांत जमून रहाणे, ही सहनशिलतेची महाकठीण अवस्था आहे. यासाठी याला वेगळे वर्णन केले. ''राबितू'' युद्धाच्या रणक्षेत्रात किंवा युद्धाच्या तयारीत मोर्चा बांधून, नेहमी सावध आणि हुशार 'जिहाद' करीता तयार रहाणे व सज्ज रहाणे आहे. हे पण फार मोठे प्रयत्नांची पराकाष्ठा असलेले आणि धाडसाचे काम आहे. म्हणून हदीसमध्ये याचे श्रेष्ठत्व असे सांगण्यात आले की, ''अल्लाहच्या मार्गात, (जिहाद मध्ये), एका दिवसाचा पडाव टाकणे (म्हणजे मोर्चा बांधणे) जग आणि जगांत जे काही आहे त्यापेक्षा उत्तम आहे.'' (सहीह बुखारी) याशिवाय हदीसमध्ये, असह्य परिस्थिती मध्ये संपूर्ण वजू करून मशिदीमध्ये फार दुरून जाणे आणि नमाजी नंतर दुसऱ्या नमाजीच्या प्रतिष्ठेला पण 'रिबात' म्हटले आहे. (सहीह मुस्लीम)

महावाक्ये १७६

# (४) सू. निसा

रुकूअ २४

اٰیاتها ١٧٦ (٤) سُوْرَةُ النِّسَآءِ مَدَنِيَّةٌ (٩٢) رکوعاتها ٢٤

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

يٰۤاَيُّهَا النَّاسُ اتَّقُوْا رَبَّكُمُ الَّذِىْ خَلَقَكُمْ مِّنْ نَّفْسٍ وَّاحِدَةٍ وَّخَلَقَ مِنْهَا زَوْجَهَا وَبَثَّ مِنْهُمَا رِجَالًا كَثِيْرًا وَّنِسَآءً ۚ وَاتَّقُوا اللّٰهَ الَّذِىْ تَسَآءَلُوْنَ بِهٖ وَالْاَرْحَامَ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَلَيْكُمْ رَقِيْبًا ﴿١﴾

अहो लोकांनो! आपल्या पालनकर्त्याला भ्या; ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले(१) आणि त्यापासूनच त्याच्या पत्नीला निर्माण करून त्या दोघांपासून पुष्कळसे पुरूष आणि स्त्रिया पसरवून दिल्यात;त्या अल्लाहला भ्या, ज्याच्या नावाने एक दुसऱ्याकडे मागतात; आणि नाते संबध तोडण्यापासून पण वाचा(२). नि:संशय अल्लाहतआला तुम्हावर लक्ष ठेवून आहे①

وَاٰتُوا الْيَتٰمٰۤى اَمْوَالَهُمْ وَلَا تَتَبَدَّلُوا الْخَبِيْثَ بِالطَّيِّبِ ۪ وَلَا تَاْكُلُوْۤا اَمْوَالَهُمْ اِلٰۤى اَمْوَالِكُمْ ؕ اِنَّهٗ كَانَ حُوْبًا كَبِيْرًا ﴿٢﴾

आणि अनाथांना त्यांचे माल (संपत्ती) देऊन टाका; आणि पाक (साफ) आणि हलाल वस्तूच्या ऐवजी अपवित्र आणि हराम वस्तू घेऊ नका. आणि आपल्या मालात त्याचे माल मिसळवून खाऊन टाकू नका. नि:संशय हा फार मोठा अपराध आहे(३) ②

وَاِنْ خِفْتُمْ اَلَّا تُقْسِطُوْا فِى الْيَتٰمٰى فَانْكِحُوْا مَا طَابَ لَكُمْ مِّنَ النِّسَآءِ مَثْنٰى وَثُلٰثَ وَرُبٰعَ ۚ فَاِنْ خِفْتُمْ اَلَّا تَعْدِلُوْا فَوَاحِدَةً اَوْ مَا مَلَكَتْ اَيْمَانُكُمْ ؕ ذٰلِكَ اَدْنٰۤى اَلَّا تَعُوْلُوْا ؕ ﴿٣﴾

जर तुम्हास भीती वाटत असेल की, अनाथ मुलींशी लग्न करून तुम्ही इन्साफ कायम न ठेवू शकाल, तर इतर स्त्रियांमधून जी पण तुम्हाला चांगली वाटत असेल, तुम्ही त्यांच्याशी लग्न करून घ्या. दोन दोन, तीन तीन आणि चार चार बरोबर. पण जर तुम्हास भय असेल की, बरोबरीचे वर्तन न करू शकाल, तर एकच पुरेशी आहे, किंवा तुमच्या हस्तगत असलेली दासी(४), हे जास्त योग्य आहे. (असे केल्याने तुमच्याकडून अन्याय) आणि एकीचकडे झुकण्यापासून वाचून जाल(५)③

وَاٰتُوا النِّسَآءَ صَدُقٰتِهِنَّ نِحْلَةً ؕ فَاِنْ طِبْنَ لَكُمْ عَنْ شَىْءٍ مِّنْهُ نَفْسًا فَكُلُوْهُ هَنِيْٓــًٔا مَّرِيْٓــًٔا ﴿٤﴾

आणि स्त्रियांना त्यांची स्त्रीधने राजीखुषीने देऊन टाका, हां! परंतु जर त्या आपल्या खुषीने काही स्त्रीधन सोडून देतील तर याला आनंदाने खा प्या④

وَلَا تُؤْتُوا السُّفَهَآءَ اَمْوَالَكُمُ الَّتِىْ جَعَلَ اللّٰهُ لَكُمْ قِيٰمًا وَّارْزُقُوْهُمْ فِيْهَا وَاكْسُوْهُمْ وَقُوْلُوْا لَهُمْ قَوْلًا مَّعْرُوْفًا ﴿٥﴾

कमअक्कल लोकांना त्यांची मालमत्ता सोपवू नका, ज्या मालमत्तेला अल्लाहतआलाने तुमची गुजराण करण्याचा आधार बनविला आहे. हां! या मालातून त्यांना खाऊ पिऊ घाला, त्यांचे कपडे लत्ते करा, आणि त्यांच्याशी नरम बोलणे करून त्यांना समजवा⑤

وَابْتَلُوا الْيَتٰمٰى حَتّٰۤى اِذَا بَلَغُوا النِّكَاحَ ۚ فَاِنْ اٰنَسْتُمْ مِّنْهُمْ رُشْدًا فَادْفَعُوْۤا اِلَيْهِمْ اَمْوَالَهُمْ ۚ وَلَا تَاْكُلُوْهَاۤ اِسْرَافًا وَّبِدَارًا اَنْ يَّكْبَرُوْا ؕ وَمَنْ كَانَ غَنِيًّا فَلْيَسْتَعْفِفْ ۚ وَمَنْ كَانَ فَقِيْرًا فَلْيَاْكُلْ بِالْمَعْرُوْفِ ؕ فَاِذَا دَفَعْتُمْ اِلَيْهِمْ اَمْوَالَهُمْ فَاَشْهِدُوْا عَلَيْهِمْ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ حَسِيْبًا ﴿٦﴾

आणि अनाथांना त्यांच्या सज्ञान होईपर्यंत त्यांच्यात सुधारणा आणि त्यांना अजमावत रहा. मग जर त्यांच्यात योग्यता आणि अक्कल हुशारी पहाल तर त्यांना त्यांची मालमत्ता सोपवून टाका, आणि त्यांच्या मोठे होऊन जाण्याच्या भीतीने त्यांच्या संपत्तीला लवकर लवकर निरर्थक खर्चात संपवून टाकू नका. धनिकांनी (त्यांच्या संपत्तीपासून) (स्वत:ला) वाचविले पाहिजे. हां! जर गरीब मोहताज असेल तर रिवाजाप्रमाणे योग्य असे खावे; मग जेव्हा त्यांना त्यांची संपत्ती सोपवाल, तेव्हा साक्षी बनवून ठेवा.वास्तविक हिशेब घेण्यास अल्लाहच पुरेसा आहे(६) ⑥

१) एका जीवाने अभिप्रेत मानवाचे पितामह ह.आदम عليه السلام आहेत; म्हणजे आदम عليه السلام पासून त्यांची पत्नी ह.हव्वा عليها السلام ला निर्माण केले. ह.हव्वा عليها السلام ह.आदम عليه السلام पासून कशाप्रकारे निर्माण झाली यात मतभेद आहेत. ह.इब्ने अब्बास رضي الله عنه चे म्हणणे आहे की, ह. हव्वा पुरूष (म्हणजे आदम عليه السلام) पासून निर्मिती झाली; म्हणजे त्यांच्या डाव्या पासळीपासून. एका हदीसमध्ये सांगण्यात आले आहे की, ''स्त्री पासळीपासून निर्माण करण्यात आली आहे. आणि पासळीत सर्वांत वक्र भाग वरचा हिस्सा आहे. जर तू त्याला सरळ करू इच्छील, तर तो तोडून टाकशील आणि जर तू त्याच्यापासून फायदा प्राप्त करू इच्छिल तर तू

त्याच्या वक्रतेसह फायदा उचलू शकतो. ''काही धर्मपंडितांनी या हदिसचा आधार घेत, ह.इब्ने अब्बास ﷺ च्या मताची पुष्टी केली आहे. कुरआनचे शब्द 'खलकः मिनहा' ने याच मताला मान्य करण्याचे समर्थन मिळते. ह. हव्वाची निर्मिती याच एका जिवापासून झाली आहे. ज्याला आदम म्हणण्यात येते.

२) 'वल् अर्हाम' म्हणजे रहेमों (नाते संबंधाना) तोडण्यापासून पण वाचां. 'अर्हाम' 'रहम' चे अनेकवचन आहे. अभिप्रेत नाते संबंध आहेत. जे आईच्या पोटाच्या पायावरच कायम होतात. याच्याने महरीम (म्हणजे जवळचा नातेवाईक ज्याच्याशी लग्न करणे जाएज नाही) आणि गैरमहरीम (म्हणजे जवळचा नातेवाईक ज्याच्याशी लग्न करणे जाएज आहे.) असे दोन्ही नातेसंबंध अभिप्रेत आहेत. नातेसंबंध तोडणे, सख्त मोठा गुनाह (पाप) आहे. ज्याला 'कतअ रहमी' म्हणतात. हदीसीमध्ये नाते संबंधांना कुठल्याही प्रकारे कायम ठेवणे; आणि त्यांचे हक्क अदा करण्याचे मोठे महत्त्व आणि श्रेष्ठत्व वर्णन करण्यात आले आहे; ज्याला 'सिलारहमी' म्हटले जाते.

३) 'अनाथ' जेव्हा वयात येऊन सज्ञान होऊन जाईल, तर त्याची संपत्ती त्याच्या हवाली करून टाका 'खबीस' ने खराब वस्तू आणि 'तय्यब' ने उत्तम वस्तू अभिप्रेत आहेत; म्हणजे असे करू नका की, त्यांच्या संपत्तीतून चांगल्या वस्तू घेऊन घ्या. आणि केवळ संख्या पूर्ण करण्याकरीता हलक्या प्रतिच्या वस्तू त्याच्या ऐवजी ठेऊन जा. या हलक्या वस्तूंना 'खबीस' (अपवित्र) आणि उमद्या वस्तूंना 'तय्यब' (पवित्र) ठरवून, याकडे इशारा करून दिला की, अशा प्रकारे बदल केलेला माल जो जरी मुळात 'तय्यब' (पवित्र आणि विहीत) आहे; परंतु तुमच्या या वाईट नियतीने त्याच्यात अपावित्र्य प्रवेश करून गेले. आणि आता तो पवित्र राहिला नाही. परंतु तुमच्या करीता तो आता 'खबीस' (अपवित्र आणि निशीद्ध) होऊन गेला. अशा रितीने वाईट इरादाने त्यांचा माल आपल्या मालात मिसळवून खाणे पण मना आहे; परंतु जर उद्देश (त्यांचे) भले चाहणे आहे, तर त्यांचा माल, आपल्या मालात मिसळवणे योग्य (जाएज)आहे.

४) याचा खुलासा, ह.आयेशा ﷺ नी असा केला आहे की, संपन्न आणि सौंदर्यवती अनाथ मुलगी कोण्या सांभाळकर्त्याच्या पालन पोषणाखाली असती, तर तो तिच्या संपत्ती आणि सौंदर्याने तिच्याशी लग्न तर करून घेता परंतु त्याच्या दुसऱ्या पत्नी प्रमाणे तिचा पूर्ण हक्क स्त्रीधन त्याने दिले नसते. अल्लाहतआलाने या अन्यायापासून थांबविले की, जर तुम्ही घरच्या अनाथ मुलींबरोबर न्याय करू शकत नाही तर तुम्ही त्यांच्याशी लग्न करू नका. तुमच्यासाठी दुसऱ्या स्त्रियांशी लग्न करण्याचा मार्ग खुला आहे. (सहीह बुखारी, किताबूत् तफसीर) किंबहुना एकीच्या ऐवजी दोनशी तीनशी येथ पावेतो की, चार स्त्रियापर्यंत पण तुम्ही लग्न करू शकतात; या शर्तीवर की त्यांच्या दरम्यान न्याय तगादे पुरे करू शकाल. नाहीतर फक्त एकीशीच लग्न करा. किंवा तिच्या ऐवजी दासीवरच समाधान माना. या महावाक्याने ठाऊक झाले की, एक मुसलमान पुरूष (जर तो गरजु आहे) चार स्त्रिया एकाचवेळी आपल्या विवाह बंधनात ठेऊ शकतो. परंतु यापेक्षा जास्त नाही. जसे की, सहीह हदीसीमध्ये याचे आणखी स्पष्टीकरण आणि मर्यादा स्पष्ट करून देण्यात आल्या आहेत. नबी ﷺ नी जी चारपेक्षा जास्त लग्ने केली, ते त्यांच्या साठीच खास आहे. ज्यावर कोण्या उम्मतीला अंमलबजावणी करणे जाएज (योग्य) नाही. (इब्ने कसीर)

५) म्हणजे एकाच स्त्रीशी लग्न करण्यात सलामती, भलाई (आफियत) आहे. कारण की, एकीपेक्षा जास्त पत्न्या राखण्यांत, न्यायाची बुज राखणे फार कठीण आहे. जिच्याकडे आंतरीक ओढ जास्त असेल, जीवनाच्या आवश्यकतांना पूर्ण करतांना तिच्याचकडे जास्त लक्ष दिले जाईल. अशा प्रकारे पत्नींमध्ये न्याय करण्याला तो अपयशी ठरेल आणि अल्लाहजवळ तो गुन्हेगार ठरेल. कुरआनाने या सत्याला, दुसऱ्या ठिकाणी संपूर्णरित्या अशाप्रकारे वर्णन केले आहे, ''आणि तुम्ही या गोष्टीचे सामर्थ्य बाळगणार नाही, की पत्नींच्या दरम्यान न्याय करू शकाल, जरी तुम्ही त्याचे इच्छुक असाल (म्हणून हे तर अवश्य करा) की एकीकडेच झुकून जाऊ नका. की दुसऱ्या पत्नींना अधांतरीत लटकवून ठेवावे.'' (सू. निसा-१२९) यावरून ठाऊक झाले की, एकापेक्षा जास्त लग्ने, आवश्यक जरूरी शिवाय करणे अयोग्य (नामुनासिब) आणि फारच भयानक आहे.

६) अनाथांना संपत्ती बाबतीत आवश्यक त्या सूचना दिल्यानंतर हे सांगण्याचा उद्देश हा आहे की, जोपर्यंत अनाथांची संपत्ती तुमच्याजवळ राहिली, तुम्ही तिचे कशाप्रकारे संरक्षण केले आणि संपत्ती त्याच्या हवाली केली, तर तिच्यात काही कमी जास्त किंवा कुठल्या प्रकारचा बदल केला किंवा नाही? सर्व साधारण लोकांना तर तुमच्या विश्वसनियतेची किंवा लबाडीची माहिती भेटणार नाही, परंतु अल्लाहतआलापासून तर कोणतीही गोष्ट लपून राहणार नाही. तो खचितच् जेव्हा तुम्ही त्याच्या समोर हजर व्हाल, तर तुमचा हिशोब घेऊन टाकणार. याच करीता हदीसमध्ये येते की, हे फारच जबाबदारीचे काम आहे. नबी ﷺ नी ह. अबुजर ﷺ म्हटले, ''हे अबुजर ! मी तुम्हास वृद्ध पहातो आणि तुमच्यासाठी तीच वस्तू पसंत करितो, जी आपल्यासाठी पसंत करितो. तुम्ही दोन माणसांवर सत्ताधिश बनू नका आणि कोण्या अनाथाच्या मालमत्तेचे संरक्षक पण बनू नका. आणि त्याचे पण सांभाळकर्ते बनू नका.'' (सहीह मुस्लीम)

لِلرِّجَالِ نَصِيبٌ مِّمَّا تَرَكَ الْوَالِدٰنِ وَالْاَقْرَبُوْنَ وَلِلنِّسَآءِ نَصِيبٌ مِّمَّا تَرَكَ الْوَالِدٰنِ وَالْاَقْرَبُوْنَ مِمَّا قَلَّ مِنْهُ اَوْ كَثُرَ نَصِيبًا مَّفْرُوْضًا ﴿٧﴾

**आईबाप आणि नातेवाईकांच्या मागे सोडलेल्या संपत्तीत पुरूषांचा पण वाटा आहे आणि स्त्रियांचापण (जी संपत्ती आईबाप आणि नातेवाईक सोडून मरतील) जरी ती संपत्ती कमी असो अथवा जास्त (यांत) वाटा निश्चित केलेला आहे[१] ⑦**

وَاِذَا حَضَرَ الْقِسْمَةَ اُولُوا الْقُرْبٰى وَالْيَتٰمٰى وَالْمَسٰكِيْنُ فَارْزُقُوْهُمْ مِّنْهُ وَقُوْلُوْا لَهُمْ قَوْلًا مَّعْرُوْفًا ﴿٨﴾

**आणि जेव्हा वाटणीच्या वेळी नातेवाईक आणि अनाथ आणि गरीब येऊन लागतील तर त्यांच्यामधून कमी जास्त त्यांनापण देऊन टाका आणि त्यांच्याशी मृदु भाषेत बोला[२] ⑧**

وَلْيَخْشَ الَّذِيْنَ لَوْ تَرَكُوْا مِنْ خَلْفِهِمْ ذُرِّيَّةً ضِعٰفًا خَافُوْا عَلَيْهِمْ فَلْيَتَّقُوا اللّٰهَ وَلْيَقُوْلُوْا قَوْلًا سَدِيْدًا ﴿٩﴾

**आणि (त्यांना) पाहिजे त्यांनी या गोष्टीला भ्यावे, जर ते स्वत: आपल्यामागे (लहानपण) दुर्बल मुले सोडून जातील (तर) त्यांचा मरून जाण्याचा घोर लागला असता (तर त्यांची पसंती काय असती) तर त्यांना पाहिजे की, अल्लाहतआलाला भिऊन नीट संभाषण करावे[३] ⑨**

(१) इस्लामपूर्वी हा एक अन्यायपण प्रचलित होता की, स्त्रिया आणि लहान मुलांना पैतृक संपत्तीत वाटा दिला जात नसे आणि फक्त मोठे मुलगे जे युद्ध करण्यास पात्र असत, सर्व मालमत्तेचे वारसदार ठरविण्यात येत. या महावाक्यात अल्लाहतआलाने म्हटले की, पुरूषांप्रमाणे स्त्रिया आणि मुले,मुली आपल्या आईबापांच्या आणि नातेवाईकांच्या संपत्तीत वाटेकरी होतील. त्यांना वंचित ठेवण्यात येणार नाही. तथापि ही वेगळी गोष्ट आहे की, मुलीचा वाटा मुलाच्या अर्धा आहे. (जसे की, ३ महावाक्यांनतर उल्लेखित आहे.) हा स्त्रीवर अन्याय नाही आणि तिला कमी देणे ही नाही. परंतु इस्लामचा हा पैतृक मालमत्तेचा कायदा न्यायाची अचूक पुर्तता करणारा आहे. कारण की स्त्रीला इस्लामने उपजिवीकेच्या जबाबदारीपासून मुक्त ठेवले आहे. आणि पुरूषाला तिचा जबाबदार बनविले आहे. याशिवाय स्त्रीजवळ स्त्रीधनाच्या रूपाने पण संपत्ती येते. जी एक पुरूषच तिला देत असतो. या दृष्टीने स्त्रीच्या तुलनेत पुरूषावर कितीतरी पटीने जास्त आर्थिक जबाबदाऱ्या आहेत. या करीता जर स्त्रीचा वाटा अर्ध्या ऐवजी जर पुरूषाच्या बरोबर असता तर हा पुरूषावर अन्याय झाला असता. परंतु अल्लाहतआलाने कुणावरही अन्याय केलेला नाही. कारण की, तो न्यायप्रियपण आहे आणि बुद्धीमान पण आहे.

(२) याला काही आलीमांनी पैतृक संपत्ती बाबतचे महावाक्य म्हणून रद्द ठरविले आहे. परंतू खरी गोष्ट अशी आहे की, हे रद्द झालेले नाही; उलट एक फारच महत्त्वाची चारित्र्य संवर्धनाची सूचना आहे की, मदतीस पात्र नातेवाईकामधून जे लोक पैतृक संपत्तीत वाटेकरी नसतील त्यांना पण वाटणीच्या वेळला काही देऊन टाका; तसेच त्यांच्याशी वार्तालाप प्रेमाने करा. धनाला आपल्याकडे येतांना बघून कारून आणि फिरऔन बनू नका.

(३) काही भाष्यकारांजवळ याच्याने उद्देशीत ते लोक आहेत, (ज्यांना मृत्यूपत्र (सूचना) करण्यात येते) त्यांना सूचना करण्यात येत आहे की, ज्यांच्या संरक्षणात जे अनाथ आहेत त्यांच्याबरोबर अशी वागणूक केली पाहिजे, जी ते आपल्या मुलांबरोबर आपल्या मरणानंतर केली जाण्याचे इच्छुक आहेत. काहींच्या जवळ याच्याने उद्देशीत सर्व साधारण लोक आहेत की, त्यांनी अनाथ आणि इतर लहान मुलांबरोबर चांगली वागणूक ठेवावी. या गोष्टीला दृष्टीआड करून की, ते त्यांच्या संरक्षणात असो किंवा नसो. काहींच्या जवळ याच्याने उद्देशीत ते आहेत, जे लवकर मृत्यू पावणाऱ्या माणसाजवळ बसलेले असतील. त्यांची जबाबदारी आहे की, त्यांनी मरणाऱ्याला चांगल्या गोष्टी समजवाव्या की, त्याने अल्लाहच्या हक्कात कोताई करू नये; तसे मानवांच्या (बनी आदम) हक्कांत सुद्धा आणि मृत्यूपत्र करतांना त्याने या गोष्टी लक्षात ठेवाव्यात. जर तो फार सुसंपन्न आहे तर एकतृतियांश संपत्तीचे मृत्यूपत्र अशा लोकांसाठी जरूर करावे, जे त्याच्या जवळच्या नातेवाईकांत गरीब आणि मदतीला पात्र आहेत किंवा मग कोण्या धार्मिक उद्देश आणि संस्थावर खर्च करण्याचे मृत्यूपत्र करावे, कारण की, ही संपत्ती परलोकांत त्याच्यासाठी कामी यावी आणि जर तो सुसंपन्न नाही; तर त्याला एकतृतियांश संपत्तीत मृत्यूपत्र करण्यावाचून मना करण्यात यावे कारण की, त्याच्या घरचे लोक नंतर दारिद्र्य आणि गरीबीत व्यस्त न व्हावेत अशा प्रकारे कोणी आपल्या वारसदाराला वंचित् करू इच्छेल तर त्याला यापासून मना करण्यात यावे आणि असा विचार केला जावा की, याच्यानंतर याची मुलेबाळे दारिद्र्य आणि भुकेचा सामना करू लागले, तर त्याच्या नुसत्या कल्पनेने त्यांना काय वाटेल? असा स्पष्टीकरणाने चर्चित सर्व उद्देश याला जबाबदार आहेत (तफसीर कुरतुबी व फतहुल कदीर) सुसंपन्न मुसलमान या चारित्र्यसंवर्धक सुचनेप्रमाणे जर आपल्या एकतृतियांश संपत्तीपैकी आपल्या अनाथ नातू व नातींसाठी मृत्यूपत्र करीत जातील, तर अनाथ नातवांचा पैतृक संपत्तीचा वाटा प्रकरण इतके कठीण होणार नाही, जेवढे आज झाले आहे. ज्याच्यामुळे सरकारने धर्मात ढवळाढवळ करून जबरदस्तीने सामील करून ठेवले आहे.

إِنَّ الَّذِينَ يَأْكُلُونَ أَمْوَالَ الْيَتَامَىٰ ظُلْمًا إِنَّمَا يَأْكُلُونَ فِي بُطُونِهِمْ نَارًا ۖ وَسَيَصْلَوْنَ سَعِيرًا ﴿١٠﴾

नि:संशय जे लोक नाहक अन्यायाने अनाथांची संपत्ती खाऊन टाकतात ते आपल्या पोटात केवळ अंगारेच भरतात आणि ते लवकरच नरकाग्नीत जातील ⑩

يُوصِيكُمُ اللَّهُ فِي أَوْلَادِكُمْ ۖ لِلذَّكَرِ مِثْلُ حَظِّ الْأُنثَيَيْنِ ۚ فَإِن كُنَّ نِسَاءً فَوْقَ اثْنَتَيْنِ فَلَهُنَّ ثُلُثَا مَا تَرَكَ ۖ وَإِن كَانَتْ وَاحِدَةً فَلَهَا النِّصْفُ ۚ وَلِأَبَوَيْهِ لِكُلِّ وَاحِدٍ مِّنْهُمَا السُّدُسُ مِمَّا تَرَكَ إِن كَانَ لَهُ وَلَدٌ ۚ فَإِن لَّمْ يَكُن لَّهُ وَلَدٌ وَوَرِثَهُ أَبَوَاهُ فَلِأُمِّهِ الثُّلُثُ ۚ فَإِن كَانَ لَهُ إِخْوَةٌ فَلِأُمِّهِ السُّدُسُ ۚ مِن بَعْدِ وَصِيَّةٍ يُوصِي بِهَا أَوْ دَيْنٍ ۗ آبَاؤُكُمْ وَأَبْنَاؤُكُمْ لَا تَدْرُونَ أَيُّهُمْ أَقْرَبُ لَكُمْ نَفْعًا ۚ فَرِيضَةً مِّنَ اللَّهِ ۗ إِنَّ اللَّهَ كَانَ عَلِيمًا حَكِيمًا ﴿١١﴾

अल्लाहतआला तुम्हांस तुमच्या संततीबाबत आदेश देतो की, एका मुलाचा वाटा दोन मुलींबरोबर आहे[१] आणि फक्त जर मुलीच असतील आणि दोन पेक्षा जास्त असतील; तर त्यांना पैतृक संपत्तीच्या (मतरूका) दोन तृतियांश मिळेल[२] आणि जर एकच मुलगी असेल तर तिच्यासाठी अर्धा (वाटा) आहे. आणि मृताच्या आईवडीलांमधून प्रत्येकाला त्याने सोडून गेलेल्या संपत्तीत सहाव्वा वाटा आहे, जर त्याची (मृताची) संतती असेल[३] आणि जर संतती नसेल आणि आईबाप वारसदार ठरत असतील, तर त्याच्या आईसाठी तिसरा वाटा आहे[४] हां! जर मृताचे कित्येक भाऊ असतील, तर त्याच्या आईसाठी सहावा वाटा आहे[५]. हे वाटे मृत्यूपत्राप्रमाणे वाटे दिल्यानंतर आहे, जो मरण पावणारा करून गेला असेल. किंवा कर्जाची परतफेड केल्यानंतर. तुमचे वडील असो किंवा तुमचे पुत्र तुम्हास ठाऊक नाही की, याच्यातून कोण तुम्हाला फायदा पोहचविण्याला जास्त योग्य आहे[६]. हे वाटे, अल्लाहतआलाकडून निश्चित केलेले आहेत. नि:संशय अल्लाहतआला सर्व काही जाणतो आणि तो पूर्ण युक्तिसंपन्न आहे ⑪

وَلَكُمْ نِصْفُ مَا تَرَكَ أَزْوَاجُكُمْ إِن لَّمْ يَكُن لَّهُنَّ وَلَدٌ ۚ فَإِن كَانَ لَهُنَّ وَلَدٌ فَلَكُمُ الرُّبُعُ مِمَّا تَرَكْنَ ۚ مِن بَعْدِ وَصِيَّةٍ يُوصِينَ بِهَا أَوْ دَيْنٍ ۚ وَلَهُنَّ الرُّبُعُ مِمَّا تَرَكْتُمْ إِن لَّمْ يَكُن لَّكُمْ وَلَدٌ ۚ فَإِن كَانَ لَكُمْ وَلَدٌ فَلَهُنَّ الثُّمُنُ مِمَّا تَرَكْتُم ۚ مِّن بَعْدِ وَصِيَّةٍ تُوصُونَ بِهَا أَوْ دَيْنٍ ۗ وَإِن كَانَ رَجُلٌ يُورَثُ كَلَالَةً أَوِ امْرَأَةٌ وَلَهُ أَخٌ أَوْ أُخْتٌ فَلِكُلِّ وَاحِدٍ مِّنْهُمَا السُّدُسُ ۚ فَإِن كَانُوا أَكْثَرَ مِن ذَٰلِكَ فَهُمْ شُرَكَاءُ فِي الثُّلُثِ ۚ مِن بَعْدِ وَصِيَّةٍ يُوصَىٰ بِهَا أَوْ دَيْنٍ غَيْرَ مُضَارٍّ ۚ وَصِيَّةً مِّنَ اللَّهِ ۗ وَاللَّهُ عَلِيمٌ حَلِيمٌ ﴿١٢﴾

तुमच्या पत्न्या जे काही सोडून मृत्यू पावतील आणि त्यांना संतती नसेल तर त्याचा अर्धा भाग तुमचा आहे आणि जर त्यांना संतती असेल, तर त्यांनी सोडून दिलेल्या संपत्तीतून तुमच्या करता चौथा वाटा आहे[७]. त्या मृत्यूपत्राच्या अंमलबजावणीनंतर जे त्या करून गेल्या असतील किंवा कर्ज फेड केल्यानंतर आणि जी संपत्ती तुम्ही सोडून जाल त्यात त्यांच्यासाठी (पत्नीसाठी) चौथा वाटा आहे, जर तुम्हास संतती नसेल. आणि तुम्हास संतती असेल तर, त्यांना तुम्ही सोडून गेलेल्या संपत्तीचा आठवा भाग मिळेल[८]. त्या मृत्यूपत्राप्रमाणे जे तुम्ही करून गेला असेल आणि कर्जफेडीच्या नंतर.आणि ज्यांची पैतृक संपत्ती (मिरास) घेतली जाते, तो पुरूष अथवा स्त्री 'कलाला' असेल, म्हणजे त्याचा बाप किंवा मुलगा नसेल[९] आणि त्याचा एक भाऊ किंवा एक बहीण असेल[१०], तर त्या दोघांमधून प्रत्येकाचा सहाव्वा हिस्सा आहे आणि जर याच्या पेक्षा जास्त असतील. एक तृतियांशमध्ये सर्व सहभागी आहेत[११]. त्या मृत्यूपत्रानंतर जे केले गेले असेल आणि कर्जानंतर[१२] जेव्हा की इतरांचे नुकसान न केले गेले असेल[१३] हे निश्चित केलेले अल्लाहतआलाकडून आहे आणि अल्लाहतआला ज्ञानी आणि दयार्द्र आहे ⑫

१) याची वास्तविकता आणि त्याचे न्यायावर आधारित असणे आम्ही स्पष्ट करून चुकलो आहोत. वारसा हक्कात मुलगी आणि मुलगे दोन्ही असतील तर, मग या तत्त्वाप्रमाणे वाटणी होईल. मुलगे लहान असोत किंवा मोठे, त्याचप्रमाणे मुली लहान असोत किंवा मोठ्या सर्व वारसदार होतील. येथपावेतो की, 'जिनीन' (म्हणजे आईच्या पोटांत वाढत असलेले) मूलपण वारीस होईल, तथापि काफिर संतती वारसदार होणार नाही.

२) म्हणजे पुत्र कोणी नसेल तर, संपत्तीच्या दोन तृतियांश (म्हणजे एकूण संपत्तीचे तीन हिस्से करून त्यातील दोन हिस्से) दोनपेक्षा जास्त मुलींना दिले जातील आणि जर फक्त दोनच मुली असतील, तरी सुद्धा त्यांना २/३ हिस्सा

दिला जाईल. जसे हदीसमध्ये येते की, ह.साद बिन रबीअ ﵁ ओहुदमध्ये शहीद झाले; आणि त्यांच्या दोन मुली होत्या परंतु सआदच्या संपत्तीवर त्यांच्या एका भावाने कब्जा करून घेतला तर नबी ﷺ नी त्या दोन मुलींना त्यांच्या काकाकडून दोन तृतियांश माल देवविला. (तिरमिजी, अबुदाऊद आणि इब्ने माजा) याशिवाय सू.निसाच्या शेवटी दाखविण्यात आले आहे की, जर कोण्या मृत्यू पावणाऱ्याला वारीस फक्त दोन बहिणी असतील तर त्यांच्यासाठी सुद्धा दोन तृतियाश हिस्सा आहे. तथापि, जेव्हा दोन बहिणी, दोन तृतियांश संपत्तीचे वारस होतील, तर दोन मुली प्रथम प्राधान्याने दोन तृतियांश संपत्तीच्या वारस होतील. ज्याप्रमाणे दोन बहिणीपेक्षा जास्त असल्यास त्यांना दोनपेक्षा जास्त मुलींच्या आदेशात ठेवण्यात आले आहे. (फत्हुल कदीर) स्पष्ट अर्थ असा झाला की, दोन किवा दोनपेक्षा जास्त मुली असतील तर दोन्ही प्रकारांत पैतृक संपत्तीत दोन तृतियांश मुलींचा हिस्सा असेल. बाकी संपत्तीत त्यांच्या वडीलांच्या नातेवाईकांत म्हणजे असबा मध्ये विभागली जाईल.

३) आई वडीलांच्या हिश्याचे तीन प्रकार वर्णन करण्यांत आले आहे. हा पहिला प्रकार आहे की, मृत्यू पावणाऱ्याची जर संतती पण असेल, तर मृत्यू पावणाऱ्याच्या आई वडीलांमधून प्रत्येकाला सहावा भाग मिळेल. म्हणजे बाकी दोन तृतियांश संपत्ती संततीत विभागली जाईल. तथापि मृत्यू पावणाऱ्याच्या संतती जर फक्त एक मुलगी असेल, तर त्यांतून फक्त अर्धी संपत्ती (म्हणजे सहा भागातून तीन भाग) मुलगीचे होतील. आणि एक षष्ठमांश (सहावा भाग) आईला आणि एक षष्ठमांश भाग वडीलांना दिल्यानंतर आणखी एक षष्ठमांश बाकी राहून जाईल. म्हणून हा शिल्लक राहणारा सहावा भाग,'असबा' म्हणून वडीलांच्या हिश्श्यांत जाईल. म्हणजे या स्वरूपात वडिलांना दोन षष्ठमांश मिळतील. एक वडील म्हणून, दुसरा 'असबा' होण्यामुळे.

४) हे दुसरे स्वरूप आहे की, मृत्यू पावणाऱ्याला संतती नाही. (लक्षात असू द्या की नातू नात (मुलाची संतती) पण संतती मध्ये एकमताने सामिल आहेत.) या प्रकारांत आईसाठी तिसरा हिस्सा आहे आणि बाकी दोन हिस्से (जे आईच्या हिश्श्याच्या दुप्पट आहेत) बापाला 'असबा' म्हणून मिळतील. आणि जर आई वडीलांबरोबर मृत्यू पावणाऱ्या पुरूषाची पत्नी किंवा मृत्यू पावणाऱ्या स्त्रीचा पती पण जिवंत आहे, तर सर्वमान्य म्हणण्याप्रमाणे पत्नी किंवा पतीचा हिस्सा (ज्याचे स्पष्टीकरण पुढे येत आहे.) काढून बाकी उरलेल्या संपत्तीतून आईकरता एक तृतियांश (तिसरा हिस्सा) आणि बाकी वडीलांकरीता असेल.

५) हा तिसरा प्रकार आहे. की मृत्यू पावणाऱ्याच्या आई वडीलांबरोबर भाऊ बहिणीपण जिवंत आहेत. त्या भाऊबहिणी सख्खे म्हणजे एकाच आई वडीलांची संतती असोत किंवा बाप एक असेल आणि आई वेगवेगळ्या असतील म्हणजे सावत्र (आईकडून) भाऊ बहीणी असोत किंवा आई एक आणि बाप वेगवेगळे असतील म्हणजे सावत्र (बापाकडून) असोत, जरी हे भाऊ बहीण मृताच्या वडीलांच्या उपस्थितीत वारसाचे हक्कदार होत नसले, परंतु आईकरीता हजब (नुकसानीचे कारण) बनून जातील. म्हणजे जेव्हा एकापेक्षा जास्त असतील तर आईच्या तिसऱ्या हिश्श्याला सहाव्या हिश्श्यांत बदलून टाकतील. बाकी सर्वमाल (५/६) बापाच्या हिश्श्यात चालला जाईल. या अटीवर की, आणखी कोणी वारसदार नसावा. हाफीज इब्ने कसीर लिहितात, की बुहतेकांजवळ दोन भावांचापण तोंच आदेश आहे. जो दोन पेक्षा जास्त भावांचा चर्चिला गेला. याचा अर्थ असा झाला की, जर एक भाऊ किंवा एक बहीण असेल तर या स्वरूपात आईचा तिसरा हिस्सा कायम राहिल तो सहाव्या हिश्श्यांत बदलणार नाही. (तफसीर इब्ने कसीर).

६) यासाठी तुम्ही आपल्या मताप्रमाणे पैतृक संपत्तीची (विरासतची) वाटणी करू नका. परंतु अल्लाहच्या आदेशाप्रमाणे ज्याचा जेवढा वाटा निश्चित करून देण्यात आला आहे तो त्यांना द्या.

७) संततीच्या अनुपस्थितीत मुलाची संतती म्हणजे नातुपण मुलाच्या आदेशांत आहेत. यावर उम्मतच्या धर्मपंडिताचे एकमत आहे. (फत्हुल कदीर व इब्ने कसीर) त्याचप्रमाणे मृत्यू पावणाऱ्या पतीची संतती जरी त्याची वारस होणारी सध्याची त्याची पत्नी असो किंवा कुण्या दुसऱ्या पत्नीपासून. अशाच प्रकारे मृत्यू पावणाऱ्या स्त्रीची संतती तिचा वारिस होणाऱ्या उपस्थित पतीकडून असो किंवा पूर्वीच्या कोण्यापतीकडून.

८) पत्नी जर एक असेल तरी सुद्धा तिला चौथा किंवा आठवा हिस्सा मिळेल जर जास्त असतील तरी सुद्धा हाच हिस्सा त्यांच्यात विभागला जाईल. प्रत्येकीला चवथा किंवा आठवा हिस्सा मिळणार नाही. यावर पण सर्वांचे मतैक्य आहे.

(फत्हुल कदीर)
९) 'कलाला' ने अभिप्रेत तो मृत आहे, ज्याचा बापपण नाही आणि मुलगा पण नाही.
१०) याच्याने अभिप्रेत 'अखयाफी' बहीण भाऊ आहेत; म्हणजे ज्यांची आई एक आहे आणि बाप वेगवेगळे. कारण की, सख्खा भाऊ बहीण किंवा अल्लाती बहीण भाऊ (ज्यांचा बाप एक आहे; आणि आई वेगवेगळ्या) चा मिरास चा हिस्सा याप्रमाणे नाही. आणि याचे वर्णन या अध्यायाच्या शेवटी येत आहे. आणि या प्रश्नावर पण मतैक्य आहे. (फत्हुल कदीर) मुळांत वंश (वृद्धी) साठी पुरूष आणि स्त्रीमध्ये 'लिज् ज़करे मिस्लो हज्जील उनसययैन'' चा कायदा चालतो. हे तेच कारण आहे की, पुत्र आणि कन्यासाठी या ठिकाणी आणि बहीण भावांकरीता सू.निसाच्या शेवटच्या महावाक्यांत प्रत्येक दोन्ही ठिकाणी हाच कायदा आहे. तथापि फक्त आईच्या संततीत कारण की, वंशाचा सहभाग नसतो; यासाठी तेथे प्रत्येकाला समान हिस्सा दिला जातो. तथापि एक भाऊ किंवा एक बहिणीच्या स्वरूपात प्रत्येकाला सहावा भाग मिळेल.
११) एकापेक्षा जास्त असण्याच्या स्वरूपांत हे सर्व एक तृतियांश वाट्यांत सहभागी होतील. तसेच यांच्यात स्त्री व पुरूषाच्या अनुषंगाने पण फरक केला जाणार नाही. भेदाभेद केल्याशिवाय सर्वांना समान हिस्सा दिला जाईल. पुरूष असो अथवा स्त्री.
मलहुजा : आईकडून जन्मलेला म्हणजे अखयाफी भाऊ काही आदेशांत दुसऱ्या वारसांपेक्षा वेगळे आहेत.

अ) हे फक्त आईच्या कारणे वासरदार होतात.

ब) त्यांचे स्त्री आणि पुरूष हिश्श्यात समान राहतील.

क) हे त्यावेळी वारसदार होतील, जेव्हा मृत (व्यक्ती) 'कलाल' असेल. मग वडील,आजोबा,पुत्र आणि नातू (मुलाकडून) वगैरेच्या उपस्थितीत, हे वारसदार होणार नाहीत.

ड) त्यांचे पुरूष आणि स्त्रिया किती का जास्त असेना, त्यांचा हिस्सा तिसरा (एक तृतियांश) पेक्षा जास्त असणार नाही. आणि जसे की, वर सांगण्यात आले, त्यांना त्यांच्या मरण पावलेल्या 'अखयाफी' भावापासून जी संपत्ती मिळेल, त्यात पुरूष आणि स्त्रियांचा समान वाटा राहील, असे नाही की पुरूषाला स्त्रीपेक्षा दुप्पट मिळेल, ह.उमर ﵁ नी आपल्या खिलाफत काळात हाच निर्णय केला होता. आणि इमाम जोहरी म्हणतात. ह.उमर ﵁ नी हा निर्णय नक्कीच यामुळे केला असणार, जेव्हा त्यांचेजवळ नबी ﷺ ची कोणी हदीस असेल (इब्ने कसीर).

१२) मिरासचे आदेश वर्णन करण्याबरोबर हे तिसऱ्यांदा सांगण्यात येत आहे की, पैतृक संपत्तीची वाटणी मृत्यूपत्रावर अंमलबजावणी, आणि कर्ज फेडीनंतर केली जावी. ज्याने जाणवते की, या दोन्ही गोष्टीवर अंमलबजावणी करणे किती आवश्यक आहे. मग यावर पण मतैक्य आहे की, सर्वांत प्रथम कर्जांची परतफेड केली जावी. आणि मृत्यूपत्रावर अंमलबजावणी याच्यानंतर केली जाईल. अल्लाहतआलाने तिन्ही ठिकाणी मृत्यूपत्राचा उल्लेख 'दैन' (कर्जा) च्या पूर्वी केलेला आहे. वास्तविक श्रमाच्या अनुषंगाने 'दैन' मध्ये (कर्जा) चा उल्लेख पहिले व्हावयास पाहिजे होता. याच्यात शहाणपण हे आहे की, कर्जाच्या फेडीला तर लोक महत्त्व देतात; महत्त्व जरी दिले नाही, तरी घेणारे जबरदस्ती वसूल करून घेतात. परंतु मृत्यूपत्रावर अंमलबजावणी करण्याला आवश्यक समजले जात नाही. आणि बहुतेक लोक याच्यात आळसाने आणि सुस्तीने काम करतात. म्हणून मृत्यूपत्राचा पहिले उल्लेख करून त्याचे महत्त्व स्पष्ट करून देण्यात आले (रूहुल मआनी)
**मलहुज़ा:** जर पत्नीची 'मेहर' (स्त्रीधन) चा हक्क अदा केला गेला नसेल, तर तो पण 'दैन' (कर्जात) मध्ये सामील केला जाईल आणि त्याचे अदा करणेसुद्धा विरासत (पैतृक संपत्ती) च्या वाटणीपूर्वी आवश्यक आहे. तसेच पत्नीचा वाटा शरीअतप्रमाणे या मेहरपेक्षा अतिरिक्त असणार.
१३) जाणून बुजून मृत्यूपत्रामार्फत कोण्या वारसदाराला वंचित करून दिले जाईल, किंवा कोणाचा वाटा कमी जास्त करून दिला जाईल. किंवा असेच वारसदारांना नुकसान पोहचविण्यासाठी सांगून टाकावे की, अमूक व्यक्तीकडून मी इतके कर्ज घेतले आहे, वास्तविक काहीच घेतलेले नसावे. जणू नुकसानाचा संबंध मृत्यूपत्र आणि कर्ज दोघांशी आहे. आणि या दोघांमार्फत नुकसान पोहचविणे मना आहे आणि मोठा गुनाह आहे. तसेच असे मृत्यूपत्र पण रद्द होईल.

تِلْكَ حُدُوْدُ اللّٰهِ ۭ وَمَنْ يُّطِعِ اللّٰهَ وَ رَسُوْلَهٗ يُدْخِلْهُ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا ۭ وَذٰلِكَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ﴿١٣﴾

**या मर्यादा अल्लाहतआलाच्या निश्चित केलेल्या आहेत; आणि जो अल्लाहतआलाचे आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करील त्याला अल्लाहतआला स्वर्गाच्या बागांत घेऊन जाईल, ज्याच्याखाली पाण्याचे पाट वहात आहेत. ज्यांच्यात ते नेहमी राहतील आणि हे फार मोठे साफल्य आहे (१३)**

وَمَنْ يَّعْصِ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ وَيَتَعَدَّ حُدُوْدَهٗ يُدْخِلْهُ نَارًا خَالِدًا فِيْهَا ۠ وَلَهٗ عَذَابٌ مُّهِيْنٌ ﴿١٤﴾

**आणि जो मनुष्य अल्लाहतआलाचे आणि त्याच्या रसूल चे आज्ञाभंजन करीन आणि त्याच्या बांधीव मर्यादांचे उल्लंघन करील, त्याला तो नरकाग्नीत टाकून देईन, ज्यांत तो नेहमी राहील अशाच (लोकां) करीता फजितीची शिक्षा आहे (१४)**

وَالّٰتِيْ يَاْتِيْنَ الْفَاحِشَةَ مِنْ نِّسَاۗىِٕكُمْ فَاسْتَشْهِدُوْا عَلَيْهِنَّ اَرْبَعَةً مِّنْكُمْ ۚ فَاِنْ شَهِدُوْا فَاَمْسِكُوْهُنَّ فِي الْبُيُوْتِ حَتّٰى يَتَوَفّٰىهُنَّ الْمَوْتُ اَوْ يَجْعَلَ اللّٰهُ لَهُنَّ سَبِيْلًا ﴿١٥﴾

**तुमच्या स्त्रियांमधून ज्या निर्लज्जपणाचे काम करतील त्यांच्यावर आपल्यातून चार साक्षीदार बोलवा, तर ते साक्ष देतील तर त्या स्त्रियांना घरात बंदिस्त ठेवा. येथपावेतो की, मृत्यू त्यांची आयुष्ये पूर्ण करून टाकील[१] किंवा अल्लाहतआला त्यांच्यासाठी काही आणखी मार्ग काढील[२] (१५)**

وَالَّذٰنِ يَاْتِيٰنِهَا مِنْكُمْ فَاٰذُوْھُمَا ۚ فَاِنْ تَابَا وَاَصْلَحَا فَاَعْرِضُوْا عَنْهُمَا ۭ اِنَّ اللّٰهَ كَانَ تَوَّابًا رَّحِيْمًا ﴿١٦﴾

**आणि तुमच्यातून जे दोघे असे (बद) कर्म करतील[३], त्यांना मारहाण करा[४]. जर ते पश्चात्ताप करतील आणि आपली स्थिती सुधारतील, तर त्यांच्या वाट्यास जाऊ नका. नि:संशय अल्लाहतआला पश्चात्ताप मान्य करणारा आणि दयाळू आहे (१६)**

اِنَّمَا التَّوْبَةُ عَلَي اللّٰهِ لِلَّذِيْنَ يَعْمَلُوْنَ السُّوْۗءَ بِجَهَالَةٍ ثُمَّ يَتُوْبُوْنَ مِنْ قَرِيْبٍ فَاُولٰۗىِٕكَ يَتُوْبُ اللّٰهُ عَلَيْهِمْ ۭ وَكَانَ اللّٰهُ عَلِــيْمًا حَكِـيْمًا ﴿١٧﴾

**अल्लाहतआला फक्त त्याच लोकांची तौबा (पश्चात्ताप) मान्य करतो, जे अज्ञानाने काही दुष्कृत्य करून बसतात, मग लवकरच त्याच्याकडून परावृत्त होतात आणि पश्चात्ताप व्यक्त करतील, तर अल्लाहतआला पण त्यांचा पश्चात्ताप मान्य करतो आणि अल्लाहतआला सर्व काही जाणतो, युक्ती संपन्न आहे (१७)**

१) हे कुकृत्य करणाऱ्या स्त्रियांच्या कुकृत्याची, ती शिक्षा आहे, जी इस्लामच्या सुरवातीला, जेव्हा की, व्याभिचाराची शिक्षा नक्की झाली नव्हती, तात्पुरत्या स्वरूपात निश्चित करण्यात आली होती. व्याभिचाराच्या सिद्ध करण्याला चार पुरूष साक्षीदारांचे असणे आवश्यक आहे. जणू ज्याप्रकारे व्याभिचाराची शिक्षा कडक निश्चित केली गेली आहे. त्याच्या सिद्ध करण्याला साक्षीदारांचीपण कडक अट लागू करून देण्यात आली आहे. म्हणजे चार मुसलमान पुरूष डोळ्यांनी पाहिलेले साक्षीदार याच्या शिवाय धर्म शास्त्रीय शिक्षा लागू करणे शक्य होणार नाही.

२) ह्या मार्गाने अभिप्रेत व्याभिचाराची ती शिक्षा आहे, जी नंतर निश्चित केली गेली. म्हणजे विवाहित स्त्री आणि पुरूष जर व्याभिचार करतील तर त्यांच्यासाठी 'रजम' ची शिक्षा आहे. (रजम म्हणजे मरेपर्यंत धोंडमार करणे) आणि अविवाहित स्त्री किंवा पुरूष व्याभिचाऱ्यांना शंभर शंभर कोडे मारण्याची शिक्षा दिली जाईल. ज्याचा तपशील (खुलासा) सू. नूर आणि सहीह हदीसींमध्ये करण्यात आला आहे.

३) काहींनी याच्याने लवंडेबाजी अभिप्रेत धरली आहे, म्हणजे समलिंगी संभोग. दोन पुरूषांचेच आपसांत बदकर्म करणे आणि काहींनी याच्याने कुवारे स्त्री पुरूष अभिप्रेत धरले आहेत. आणि याच्यापूर्वीच्या महावाक्याला त्यांनी विवाहीतांसाठी विशेष ठरविले आहे. आणि काहींनी याला स्त्री पुरूषाच्या जोडीने अभिप्रेत धरले आहे. याकडे दुर्लक्ष करून की ते कुंवारे आहेत की, विवाहीत, इब्ने जरीर तबरीने दुसरी गोष्ट (म्हणजे कुंवारे स्त्री पुरूष) ला प्राधान्य दिले आहे. आणि पहिल्या महावाक्यांत वर्णन केलेल्या शिक्षेला, नबी ﷺ नी दाखविलेली शिक्षा - धोंडमाराची शिक्षा - ने; आणि या महावाक्यांत वर्णन केलेल्या शिक्षेला, सू. नूर मध्ये वर्णन केलेल्या शंभर फटक्यांची शिक्षा - ने रद्द ठरवून टाकले आहे. (तफसीर तबरी)

४) म्हणजे शाब्दिक दांट दपट (निर्भत्सना) किंवा हाताने, मारहाण करणे. आता हे रद्द झाले आहे जसे की, वर आले.

وَلَيۡسَتِ التَّوۡبَةُ لِلَّذِيۡنَ يَعۡمَلُوۡنَ السَّيِّاٰتِ ۚ حَتّٰۤى اِذَا
حَضَرَ اَحَدَهُمُ الۡمَوۡتُ قَالَ اِنِّىۡ تُبۡتُ الۡـٰٔنَ وَلَا
الَّذِيۡنَ يَمُوۡتُوۡنَ وَهُمۡ كُفَّارٌ ؕ اُولٰٓـئِكَ اَعۡتَدۡنَا
لَهُمۡ عَذَابًا اَلِيۡمًا ﴿۱۸﴾

त्यांचा पश्चात्ताप नाही, जे दुष्कृत्ये करतच राहतील, येथपावेतो की, त्यांच्यातून कोणाजवळ मृत्यू येईल, तर सांगून टाकतील की, मी आता पश्चात्ताप केला[१], त्यांचा पश्चात्ताप पण मान्य नाही. जे कुफ्रवरच मृत्यू पावतील, हेच लोक आहेत, ज्यांच्यासाठी आम्ही दु:खदायक शिक्षा तयार करून ठेवली आहे (१८)

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوۡا لَا يَحِلُّ لَكُمۡ اَنۡ تَرِثُوا النِّسَآءَ
كَرۡهًا ؕ وَلَا تَعۡضُلُوۡهُنَّ لِتَذۡهَبُوۡا بِبَعۡضِ مَاۤ
اٰتَيۡتُمُوۡهُنَّ اِلَّاۤ اَنۡ يَّاۡتِيۡنَ بِفَاحِشَةٍ مُّبَيِّنَةٍ ۚ
وَعَاشِرُوۡهُنَّ بِالۡمَعۡرُوۡفِ ۚ فَاِنۡ كَرِهۡتُمُوۡهُنَّ
فَعَسٰۤى اَنۡ تَكۡرَهُوۡا شَيۡـئًا وَّيَجۡعَلَ اللّٰهُ فِيۡهِ خَيۡرًا
كَثِيۡرًا ﴿۱۹﴾

हे ईमानवाल्यांनो! तुम्हास विहीत (हलाल) नाही की, जबरदस्तीने स्त्रियांना (मयताचा) वारसा ठरवून त्यांच्यावर कब्जा करून घ्यावा[२]. आणि जे काही तुम्ही त्यांना दिले असेल, त्यातून काही हिराऊन घ्यावे[३], यासाठी त्यांना अडवून ठेऊ नका. हां! ही वेगळी गोष्ट आहे की, ते काही स्पष्ट दुष्कृत्ये आणि निर्लज्जपणाचे काम करतील[४]; आणि त्यांच्याशी जन शिरस्त्याप्रमाणे चांगली वागणूक ठेवा; जर तुम्ही त्यांना नापसंद कराल, परंतु फार शक्यता आहे की, तुम्ही एका वस्तूला वाईट समजावे, आणि अल्लाहतआला यांतच खूप चांगले पण करून देईल[५] (१९)

१) याच्याने स्पष्ट झाले की, मृत्यूच्यावेळी केलेली तौबा कबूल नाही. ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धा आहे. ज्याचे जरूरी स्पष्टीकरण सू. आले इमरानच्या आ.१० मध्ये येऊन चुकले.

२) इस्लामपूर्वी स्त्रीवर हा एक अन्यायपण होत असे की, कोण्या पतीच्या मरून गेल्यानंतर त्यांच्या घरचे लोक, त्याच्या संपत्तीप्रमाणे त्याच्या पत्नीचे पण जबरदस्तीने वारस बनून जात आणि स्वत: आपल्या इच्छेने तिच्या सहमतीशिवाय तिच्याशी लग्न करून घेत किंवा आपला भाऊ किंवा पुतण्याशी तिचे लग्न करून देत. इथपावेतो की, सावत्र मुलगा देखील मरणाऱ्या बापाच्या पत्नीशी लग्न करून घेत असे किंवा जर इच्छीत तर तिला कुठल्याही ठिकाणी लग्न करण्याची परवानगी देत नसत. आणि ती सर्व आयुष्य असेच घालवून देण्यासाठी बाध्य होई. इस्लामने अन्यायाच्या या सर्व पद्धतींना मनाई करून टाकली.

३) एक अत्याचार हा पण स्त्रियांवर केला जात असे की, जर पतीला ती पसंत नसेल आणि तो तिच्यापासून सुटका करून घेऊ इच्छित असेल, तर तो स्वत: तिला तलाक देत नसे, (ज्याप्रमाणे की, अशा स्थितीत इस्लामने तलाकची परवानगी दिलेली आहे.) परंतु तो तिला खूप त्रास देत असे की, तिने हतबल होऊन स्त्रीधनाचा हक्क किंवा जे काही पतीने तिला दिले असेल, ते स्वत:हून त्याला परत करून त्याच्यापासून सुटका करून होण्याला तयार व्हावी, इस्लामने अशा वागण्यालापण अत्याचार ठरविले.

४) स्पष्ट वाईटपणाने अभिप्रेत वाईट कृत्ये किंवा अपशब्द बोलणे आणि आज्ञाभंग करणे आहे. या दोन्ही प्रकारात तथापि ही परवानगी देण्यात आली आहे की, पतीने तिच्याबरोबर अशी वर्तणूक ठेवावी की, तिने त्याचा दिलेला माल किंवा स्त्रीधन (महेर) परत करून 'खुला' करण्यावर बाध्य होऊन जावी. (जसा की, 'खुला' च्या बाबतीत पतीला महेर परत घेण्याचा हक्क देण्यात आला आहे. कृपया पहावे सू.बकर: आ. क्र.२२९)

५) हा पत्नीबरोबर चांगल्या वागणुकीचा तो आदेश आहे, ज्याची कुरआनाने मोठी ताकीद केली आहे. आणि हदीसमध्ये सुद्धा नबी ﷺ नी याचे खूप स्पष्टीकरण आणि ताकीद केली आहे. एका हदीसमध्ये महावाक्यातील याच विषयाला असे वर्णन केले आहे., ''विश्वासू पुरूषा (पती) ने विश्वासु स्त्री (पत्नी) शी द्वेष बाळगू नये. जर तिची एक सवय नापसंद आहे, तर तिची दुसरी सवय आवडणारी पण असेल.'' (सहीह मुस्लीम) अर्थ असा की, निर्लज्जपणा आणि पापकर्माशिवाय, जर पत्नीत आणखी काही कोताई असेल, ज्या कारणाने पती तिला नापसंद करीत असेल, तिला उतावळेपणा करून तलाक न द्यावा; किंबहुना धैर्य आणि सहनशिलतेने काम करावे; होऊ शकते की, अल्लाहतआला यांतून त्याच्याकरता भरपूर भलाई निर्माण करून देईल, म्हणजे सदाचरणी संतती देऊन देईन किंवा तिच्या कारणे अल्लाहतआला त्याच्या कारभारांत बरकत देईल. वगैरे वगैरे. खेद आहे की, मुसलमान कुरआन व हदीसच्या या सूचनांच्या उलट, जरा जराश्या गोष्टीत आपल्या पत्नींना तलाक देऊन टाकतात आणि अशा प्रकारे इस्लामने दिलेल्या तलाकाच्या अधिकाराला फारच अत्याचारपूर्ण पद्धतीने वापरतात. वास्तविक हा अधिकार (हक्क) अत्यंत असह्य परिस्थीत वापरण्यासाठी दिला गेला होता आणि घर उजाडण्यासाठी, स्त्रियांवर अत्याचार करण्यासाठी आणि मुलांचे आयुष्य खराब करण्यासाठी नाही. याशिवाय ते इस्लामही बदनाम करण्यांत कारणीभूत होतात की, इस्लामने पुरूषाला तलाकचा हक्क देऊन स्त्रीवर अत्याचार करण्याचा अधिकार त्याला देऊन टाकला. अशाप्रकारे इस्लामचा एक मोठ्या खुबीला, खराबी आणि अत्याचार ठरविण्यात येत आहे.

وَاِنْ اَرَدْتُّمُ اسْتِبْدَالَ زَوْجٍ مَّكَانَ زَوْجٍ ۙ وَّاٰتَيْتُمْ اِحْدٰىهُنَّ قِنْطَارًا فَلَا تَاْخُذُوْا مِنْهُ شَيْـًٔا ؕ اَتَاْخُذُوْنَهٗ بُهْتَانًا وَّاِثْمًا مُّبِيْنًا ۝٢٠

आणि जर तुम्ही एका पत्नीच्या जागी, दुसरी पत्नी करूच इच्छाल आणि त्यांच्यातून कोणाला तुम्ही खजिन्याचा खजीना देऊन ठेवला असेल, तरी त्याच्यापासून काहीच घेऊ नका[१]. का तुम्ही आनाठायी गोष्ट करून व कोण्याप्रकारचे कुभांड लाऊन परत घेऊन घ्या? तुम्ही त्याला कसे घेऊन घ्याल? ⑳

وَكَيْفَ تَاْخُذُوْنَهٗ وَقَدْ اَفْضٰى بَعْضُكُمْ اِلٰى بَعْضٍ وَّاَخَذْنَ مِنْكُمْ مِّيْثَاقًا غَلِيْظًا ۝٢١

वास्तविक पाहता तुम्ही एक दुसऱ्यांशी समागम करून चुकला आहात[२] आणि त्या स्त्रियांनी तुमच्यांशी पक्के वचन घेऊन ठेवले आहे[३] ㉑

وَلَا تَنْكِحُوْا مَا نَكَحَ اٰبَآؤُكُمْ مِّنَ النِّسَآءِ اِلَّا مَا قَدْ سَلَفَ ؕ اِنَّهٗ كَانَ فَاحِشَةً وَّمَقْتًا ؕ وَسَآءَ سَبِيْلًا ۝٢٢

आणि त्या स्त्रियांशी लग्न करू नका; ज्यांच्याशी तुमच्या वडीलांनी लग्न केले आहे[४]; परंतु पूर्वी जे होऊन चूकले. हे बेशरमपणाचे काम व गहजबची गोष्ट आहे आणि फारच वाईट मार्ग आहे ㉒

حُرِّمَتْ عَلَيْكُمْ اُمَّهٰتُكُمْ وَبَنٰتُكُمْ وَاَخَوٰتُكُمْ وَعَمّٰتُكُمْ وَخٰلٰتُكُمْ وَبَنٰتُ الْاَخِ وَبَنٰتُ الْاُخْتِ وَاُمَّهٰتُكُمُ الّٰتِيْٓ اَرْضَعْنَكُمْ وَاَخَوٰتُكُمْ مِّنَ الرَّضَاعَةِ وَاُمَّهٰتُ نِسَآئِكُمْ وَرَبَآئِبُكُمُ الّٰتِيْ فِيْ حُجُوْرِكُمْ مِّنْ نِّسَآئِكُمُ الّٰتِيْ دَخَلْتُمْ بِهِنَّ ۫ فَاِنْ لَّمْ تَكُوْنُوْا دَخَلْتُمْ بِهِنَّ فَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ ۫ وَحَلَآئِلُ اَبْنَآئِكُمُ الَّذِيْنَ مِنْ اَصْلَابِكُمْ ۙ وَاَنْ تَجْمَعُوْا بَيْنَ الْاُخْتَيْنِ اِلَّا مَا قَدْ سَلَفَ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ غَفُوْرًا رَّحِيْمًا ۝٢٣

तुमच्यावर तुमच्या आई हराम केल्या आहेत[५] आणि तुमच्या मुली आणि बहिणी, तुमच्या आत्त्या आणि तुमच्या मावश्या आणि भावांच्या मुली आणि बहिणींच्या मुली आणि तुमच्या त्या आई, ज्यांनी तुम्हाला दूध पाजले असेल. आणि तुमच्या दूध बहिणी आणि तुमच्या सासू आणि तुमच्या त्या पालनपोषण केलेल्या त्या मुली ज्या तुमच्या गोदमध्ये आहेत, तुमच्या त्या स्त्रियांपासून ज्यांच्याशी तुम्ही समागम करून चुकला असाल. हां! जर तुम्ही त्यांच्याशी संभोग केला नसेल तर तुमच्यावर काही पाप नाही आणि तुमच्या पोटच्या मुलांच्या पत्न्या आणि तुमचे दोन बहिणीचे एकत्र करणे,हां! जे होऊन चुकले, ते होऊन चुकले. नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ㉓

१) स्वत: 'तलाक' देण्याच्या प्रकारात मेहेरचा हक्क परत घेण्यास कडक पद्धतीने मना करण्यात आले आहे. किनतार खजीने भरपूर संपत्तीला म्हणतात. म्हणजे कितीही महेर दिला असेल, परत घेऊ शकत नाही. जर असे कराल हा अन्याय आणि उघड गुनाह होईल.

२) 'एक दुसऱ्याला भेटून चुकले असतील.'' चा अर्थ; संभोग आहे.ज्याला अल्लाहतआलाने इशाऱ्याने वर्णन केले आहे.

३) ''पक्क्या वचनाने,' ते वचन अभिप्रेत आहे; जे लग्नाच्या वेळी पुरूषाकडून घेतले जाते की, ''तुम्ही तिला चांगल्याप्रकारे वसवावे किंवा भलाईने सोडून द्यावे.''

४) अज्ञान काळांत, सावत्र मुलगे आपल्या बापाच्या पत्नीशी (म्हणजे सावत्र आईशी) लग्न करून घेत असत. यापासून मना करण्यात येत आहे की, हे फारच निर्लज्जपणाचे काम आहे. ''वला तनकेहू मा नकहा आबावकुम'' सर्वसाधारणपणे अशा स्त्रियांशीपण लग्न करण्यांसपण मनाई करतो. जिच्याशी त्याच्याबापाने लग्न केले, परंतु संभोगापूर्वीच तलाक देऊन टाकला. ह.इब्ने अब्बास ﷺ कडून पण ही गोष्ट वर्णन करण्यात आली आहे. आणि उलमा (धर्मपंडीत) यालाच मान्यता देतात.

५) ज्या स्त्रियांशी लग्न करणे हराम (निषीद्ध) आहे. त्याचा तपशील वर्णन करण्यात येत आहे. यात सात निषीध्दा वांशिक सात दूध पाजण्यामुळे आणि चार सासरकडच्या आहेत. याच्याशिवाय रसूल ﷺ च्या हदीसने सिद्ध आहे की, पत्नीची पुतणी आणि आत्त्या आणि भाची व मावशी यांना एका निकाहमध्ये जमा (एकत्र) करणे हराम आहे. सात वांशिक निषीद्धा (महरमात) मध्ये, १) आया २) मुली ३) बहीणी ४) आत्त्या ५)मावश्या ६) पुतण्या ७) भाच्या आणि सात दूध पाजणाऱ्या मावश्या ६) दूध पाजण्यामुळेच झालेल्या पुतण्या ७) दुध पाजण्याने झालेल्या भाच्या आणि सासरकडून महरमात मध्ये, १) सासू २) संभोग केलेल्या पत्नीच्या पूर्वीच्या पतीकडून झालेल्या मुली ३) सून ४) आणि दोन सख्या बहिणींना एकत्र करणे (निकाहमध्ये) आहे. याच्याशिवाय बापाने निकाह केलेली (ज्याचे वर्णन या पूर्वीच्या आयतमध्ये आहे) आणि हदीसप्रमाणे पत्नी जोपर्यंत निकाहमध्ये आहे, तिची आत्त्या आणि तिची मावशी आणि तिची पुतणी आणि तिची भाचीशीपण लग्न करणे हराम आहे.

**वांशिक मुहरमातचा तपशील** : 'उम्महात' (आया) मध्ये आयांच्या आया, (आज्या) त्यांच्या आज्या (बापाकडून) आणि बापांच्या आया (आज्या आणि खापर आज्या आणि त्यांच्यापुढे पर्यंत) सामिल आहेत. 'बनात' (मुली) मध्ये

नाती (बापाकडून) नाती (आईकडून) पोत्या आणि नवाश्यांच्या मुली (खालपर्यंत) सामील आहेत. व्याभिचाराने जन्मलेली मुलगी, मुलीत सामील आहे किंवा नाही? यात मतभेद आहेत. तीन ईमाम तिला मुलीत शामील करतात आणि तिच्याशी लग्न करणे हराम समजतात. तथापि इमाम शाफई رحمة الله عليه म्हणतात की, शरीअतप्रमाणे ती मुलगी नाही. मग ती ज्याप्रमाणे 'युसीकुमुल्लाह् फि अवलादीकुम्' (अल्लाहतआला तुम्हांस संततीमध्ये संपत्तीची विभागणी करण्याचा आदेश देतो) मध्ये दाखल नाही. आणि नुसत्या एकमताने ती वारस नाही. त्याचप्रमाणे ती या महावाक्यात पण दाखल नाही. वल्लाह आलम्! (इब्ने कसीर) 'अखवात' (बहीणी) सख्खी असो किंवा अखयाफी (आईकडून जन्मलेली पण बाप वेगळा) असा आणि अल्लाती (बापाकडून जन्मलेली पण आई वेगळी) 'अम्मात' (आत्त्या अनेकवचन) यांत बापाची आई सर्व चर्चित असल (म्हणजे नाना (आईकडून आजोबा) दादा (बापाकडून आजोबा)) ची तिन्ही प्रकारच्या बहिणी शामील आहेत, 'खालात' (मावश्या) यांत आईच्या आणि सर्व स्त्रिया असतील (म्हणजे नानी (आईची आई) दादी (म्हणजे बापाची आई) म्हणजे तिन्ही प्रकारच्या बहिणी सामील आहेत. पुतण्या यांत तिन्ही प्रकारच्या भावांच्या संतती (मुली) संबंधामुळे किंवा संबंधांशिवाय (किंवा वांशिक आणि शाखीय) सामील आहेत. भाच्या - यांत तिन्ही प्रकारच्या बहिणींची संतती संबंधामुळे किंवा संबंधाशिवाय (किंवा वांशिक आणि शाखीय) सामील आहेत.

**दुसरा प्रकार – दूध पाजण्याच्या संबंधाने निषीद्ध झालेल्या स्त्रिया :–**

रिजाअी आई – जिचे दूध तुम्ही, मुद्दते रजाअत (म्हणजे दोन वर्षे) च्या आत प्याले असाल. रिजाई बहीण – ती स्त्री जिला तुमच्या वास्तविक आईने किंवा रिजाई आईने दूध पाजले तुमच्याबरोबर पाजले किंवा तुमच्यापूर्वी किंवा तुमच्यानंतर आणि बहीण भावांना बरोबर पाजले. किंवा ज्या स्त्रीच्या वास्तविक किंवा रिजाई आईने तुम्हास दूध पाजले जरी वेगवेगळ्या वेळी पाजले असेल. दूध पाजण्यानेही ते सर्व नातेसंबंध हराम होऊन जातील.जे वंशाने हराम होऊन जातात. याचा तपशील हा आहे की, दूध पाजणारी आई, बनणारी स्त्रीची वांशिक आणि रिजाई संतती दूध पिणाऱ्या मुलाचे बहीण भाऊ त्या स्त्रीचा पती तिचा बाप आणि त्या पतीच्या बहिणी त्याच्या आत्त्या, त्या स्त्रीच्या बहिणी, मावश्या आणि त्या स्त्रीचे जेठ व दीर, त्याचे रिजाई काका व मोठे काका बनून जातील आणि या दूध पिणाऱ्या मुलाचे वांशिक भाऊ बहीण वगैरे या घराण्यावर दूध पाजण्याच्या कारणामुळे हराम होणार नाहीत.

तिसरा प्रकार सासुरवाडीकडील निशिष्ढ स्त्रिया (महरमात) :

पत्नीची आई म्हणजे सासू (यात पत्नीच्या नानी (आईची आई) आणि दादी (म्हणजे बापाची आई) पण सामील आहेत) जर कोण्या स्त्रीशी लग्न करून संभोगशिवायच तलाक देऊन टाकला असेल तरी सुद्धा तिच्या आईशी (सासू) निकाह हराम राहील. तथापि कोण्या स्त्री बरोबर निकाह करून तिला संभोगाशिवाय तलाक देऊन टाकला असेल तर तिच्या मुलीबरोबर निकाह (योग्य) जाएज होईल. (फत्हुल कदीर) २) 'रबीबा' - पत्नीची पहिल्या पतीपासून झालेली मुलगी हीची मनाई सशर्त आहे. म्हणजे जर हिच्या आईशी संभोग करून घेतला असेल तर 'रबीबा' शी निकाह करणे हराम राहील. नाही तर दुसऱ्या स्वरूपांत हलाल राहील. 'फि हुजुरे कुम' ती 'रबीबा' जी तुमच्या ओटीत पाळली पोसली जाईल. जर ही मुलगी कोण्या आणखी ठिकाणी पण पाळली पोसली जाईल, अथवा मुक्काम करून राहील, तरी सुद्धा तिच्याशी निकाह हराम राहील. ३) 'हलायल' हे हलीलाचे अनेकवचन आहे. पत्नीला 'हलीला' यासाठी म्हटले गेले आहे की, तिचा 'महल्ल' (मुक्कामाची जागा) पती बरोबरच असते. म्हणजे जेथे पती उतरतो किंवा मुक्काम करतो, ही पण तेथेच उतरते किंवा मुक्काम करते. मुलांमध्ये 'पोते' (म्हणजे मुलाची मुले) आणि 'नवासे' (म्हणजे मुलीची मुले) पण सामील आहेत. म्हणजे त्यांच्या पत्न्यांशीपण निकाह हराम राहील. अशाच प्रकारे रिजाई संततीची दांपत्ये हराम राहतील. 'मिन असलाबेकुम' (तुमच्या वंशाच्या मुलांच्या पत्न्या) च्या अटीने हे स्पष्ट होऊन गेले की, दत्तक मुलांच्या पत्नींशी निकाह हराम नाही. ४) दोन बहिणी (रिजाई असोत किंवा एकाच वंशातील) यांच्याशी एकाचवेळी निकाह हराम आहे. तथापि एकीच्या मृत्यूनंतर किंवा तलाक नंतर ईद्दत पूर्ण केल्यानंतर, दुसऱ्या बहिणीशी निकाह जाएज (योग्य) आहे. अशाचप्रकारे चार पत्नींपैकी एकीला तलाक दिल्यानंतर पांचव्या निकाहाला परवानगी नाही. जो पर्यंत तलाक दिलेली स्त्री आपली इद्दत पुरी करून घेणार नाही.

**मलहुजा** : व्याभिचाराने हराम होणे सिद्ध होईल किंवा नाही? यांत उलमांचा मतभेत आहे. बहुतेक उलमांचे म्हणणे आहे, जर कोण्या माणसाने कोण्या स्त्रीशी वाईट कृत्य केले, तर या वाईट कृत्याच्या कारणाने ती स्त्री त्यावर हराम होणार नाही. अशाचप्रकारे जर आपल्या पत्नीची आई (सासू) शी किंवा तिच्या मुलीशी (जी दुसऱ्या पतीकडून असेल) व्याभिचार करेल, तर त्याची पत्नी त्याच्यावर हराम होणार नाही. (पुराव्यासाठी पहा फत्हुल कदीर)

وَّالْمُحْصَنٰتُ مِنَ النِّسَآءِ اِلَّا مَا مَلَكَتْ اَيْمَانُكُمْ ۚ كِتٰبَ اللّٰهِ عَلَيْكُمْ ۚ وَاُحِلَّ لَكُمْ مَّا وَرَآءَ ذٰلِكُمْ اَنْ تَبْتَغُوْا بِاَمْوَالِكُمْ مُّحْصِنِيْنَ غَيْرَ مُسٰفِحِيْنَ ۗ فَمَا اسْتَمْتَعْتُمْ بِهٖ مِنْهُنَّ فَاٰتُوْهُنَّ اُجُوْرَهُنَّ فَرِيْضَةً ۗ وَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ فِيْمَا تَرٰضَيْتُمْ بِهٖ مِنْ بَعْدِ الْفَرِيْضَةِ ۗ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَلِيْمًا حَكِيْمًا ﴿٢٤﴾

**आणि (निषिद्ध केल्या गेल्या आहेत) पातीवाल्या स्त्रिया गेल्या आहेत, परंतु त्या ज्या तुम्हाला हस्तगत होऊन जातील[१]. अल्लाहतआलाने हे आदेश तुम्हावर अनिवार्य (फर्ज) करून टाकले आहे. आणि त्या स्त्रियांशिवाय दुसऱ्या स्त्रिया तुमच्यासाठी हलाल करून दिल्या की, आपल्या संपत्तीतून मेहेर देऊन तुम्ही त्यांच्याशी लग्न करू इच्छाल, बदकर्मापासून वाचण्यासाठी आणि (केवळ) वासनापूर्तीसाठी नव्हे[२]; म्हणून तुम्ही ज्यांच्यापासून फायदा हस्तगत कराल, त्यांना त्यांची निश्चित केलेली मेहेर देऊन टाका[३]; आणि मेहेर निश्चित केल्यानंतर तुम्ही आपसात राजीखुषीने जे नक्की करून द्याल त्यांत तुम्हावर काही पाप नाही[४]. नि:संशय अल्लाहतआला (सर्व) ज्ञानी आणि युक्तीसंपन्न आहे ㉔**

وَمَنْ لَّمْ يَسْتَطِعْ مِنْكُمْ طَوْلًا اَنْ يَّنْكِحَ الْمُحْصَنٰتِ الْمُؤْمِنٰتِ فَمِنْ مَّا مَلَكَتْ اَيْمَانُكُمْ مِّنْ فَتَيٰتِكُمُ الْمُؤْمِنٰتِ ۗ وَاللّٰهُ اَعْلَمُ بِاِيْمَانِكُمْ ۗ بَعْضُكُمْ مِّنْ بَعْضٍ ۚ فَانْكِحُوْهُنَّ بِاِذْنِ اَهْلِهِنَّ وَاٰتُوْهُنَّ اُجُوْرَهُنَّ بِالْمَعْرُوْفِ مُحْصَنٰتٍ غَيْرَ مُسٰفِحٰتٍ وَّلَا مُتَّخِذٰتِ اَخْدَانٍ ۚ فَاِذَاۤ اُحْصِنَّ فَاِنْ اَتَيْنَ بِفَاحِشَةٍ فَعَلَيْهِنَّ نِصْفُ مَا عَلَى الْمُحْصَنٰتِ مِنَ الْعَذَابِ ۗ ذٰلِكَ لِمَنْ خَشِيَ الْعَنَتَ مِنْكُمْ ۗ وَاَنْ تَصْبِرُوْا خَيْرٌ لَّكُمْ ۗ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٢٥﴾

**आणि तुमच्यातून ज्याला कोणाला स्वतंत्र मुसलमान स्त्रीयांशी लग्न करण्याचे सामर्थ्य आणि संपन्नता नसेल, तर त्याने मुसलमान दासींशी, ज्यांचे तुम्ही धनी आहात (आपले लग्न करून घ्यावे) अल्लाह तुमच्या कर्मांशी चांगल्याप्रकारे वाकबगार आहे; तुम्ही सर्व आपसांत एकच तर आहात, म्हणून त्यांच्या धन्यांची परवानगी घेऊन त्यांच्याशी लग्न करून घ्या[५]; आणि कायद्याप्रमाणे त्यांचे मेहेर त्यांना द्या; त्या पवित्र चारित्र्यवान असाव्यात, जाहीररित्या कुकर्म करणाऱ्या नसाव्यात, न गुप्तरित्या प्रेमसंबंध ठेवणाऱ्या. मग जेव्हा या दासी लग्नबंधनात येऊन जातील, मग जर त्या निर्लज्जपणाचे काम करतील, तर त्यांना अर्धी शिक्षा आहे, त्या शिक्षेच्या जी स्वतंत्र स्त्रियांची आहे[६]. दासींशी लग्न करण्याचा हा आदेश, तुमच्यातून त्या लोकांसाठी आहे, ज्यांना गुनाह आणि त्रास होण्याची शक्यता वाटत असेल; आणि सहनशिलता राखाल तर (तुमच्यासाठी) उत्तम आहे. आणि अल्लाहतआला मोठा क्षमाकर्ता आणि मोठा दयाळू आहे[७] ㉕**

يُرِيْدُ اللّٰهُ لِيُبَيِّنَ لَكُمْ وَيَهْدِيَكُمْ سُنَنَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِكُمْ وَيَتُوْبَ عَلَيْكُمْ ۗ وَاللّٰهُ عَلِيْمٌ حَكِيْمٌ ﴿٢٦﴾

**अल्लाहतआला इच्छितो की, तुमच्याकरता खूप स्पष्ट करून वर्णन करून दयावे. आणि तुम्हास तुमच्या पूर्वीच्या (पुण्यावान) लोकांच्या मार्गावर चालवावे आणि तुमचा पश्चात्ताप मान्य करावा आणि अल्लाहतआला सर्व जाणणारा आणि युक्तीवान आहे ㉖**

१) कुरआन करीममध्ये 'एहसान' चार अर्थात वापरण्यात आले आहे.

१) लग्न २) स्वातंत्र्य ३) निष्कलंकता आणि ४) इस्लाम. या अनुषंगाने 'मुहसनात' चे चार अर्थ आहेत. १) विवाहीत स्त्रिया २) स्वतंत्र स्त्रिया ३) पाक दामन स्त्रिया आणि४) मुसलमान स्त्रिया. येथे पहिला अर्थ अभिप्रेत आहे. याच्या अवतरणाच्या कारणमध्ये येते की, जेव्हा काही युद्धांत काफिरांच्या स्त्रियापण मुसलमानांच्या कैदेत आल्या, तर मुसलमानांना त्यांच्याशी संभोग करण्यात घृणा वाटली, कारण की त्या विवाहीत होत्या. सहाबा ؓ नी नबी ﷺ ला विचारले, ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (इब्ने कसीर) ज्यामुळे हे ठाऊक झाले की, युद्धांत हस्तगत झालेल्या काफिर स्त्रिया, जेव्हा मुसलमानांच्या दासी बनून जातील, तर विवाहीत असूनसुद्धा त्यांच्याशी संभोग करणे जाएज (योग्य) आहे. तथापि गर्भाशयाचे खाली असणे आवश्यक आहे; म्हणजे एक मासिक पाळी आल्यानंतर किंवा सगर्भा असेल तर, गर्भ बाहेर पडल्यानंतर त्यांच्याशी शारीरिक संबंध केला जावा.

**दासीचा मसला:–** कुरआनाच्या अवतरण्याच्या वेळी गुलाम आणि दासींची प्रथा सार्वत्रिक होती. ज्याला कुरआनाने

बंद केले नाही. परंतु त्यांच्या बाबतीत अशी युक्ती अमंलात आणली गेली की, ज्यामुळे गुलामांना आणि दासींना जास्तीत जास्त सवलती मिळाव्यात. ज्यामुळे गुलामी प्रथेला आळा बसावा. गुलाम व दासी होण्याच्या दोन पध्दती होत्या. एकतर काही घराणी शेकडो वर्षापासून अशी चालू होती की, त्यांचे स्त्री पुरूष विकून टाकण्यांत येत. हेच विकत घेतलेले स्त्री पुरूष; दासी आणि गुलाम म्हणविले जात. मालकांना त्यांच्याकडून सर्व प्रकारचा फायदा उचलण्याचा हक्क प्राप्त होत असे. दुसरी प्राप्त होण्याचा मार्ग, युद्धांत कैदी झालेल्यांचा होता की, काफिरांच्या कैदी स्त्रियांना मुलसमानांत वाटून टाकण्यांत येत असे आणि त्या त्यांच्या दासी बनून त्यांच्याजवळ रहात. या काळांत कैद्यांसाठी कोणी संयुक्त राष्ट्रांचा कायदा तर अस्तित्वात नव्हता. म्हणून हा त्या काळाच्या अनुषंगाने उत्कृष्ट तोडगा होता. कारण की, जर त्यांना समाजांत असेच सोडून दिले असते; तर समाजात यांच्यामुळे फसाद निर्माण झाला असता. (तपशीलासाठी कृपया पहावे, पुस्तक 'अर्ररिक्कु फिल इस्लाम' ''इस्लाममध्ये गुलामी प्रथेची वास्तविकता'' मौ.सअीद अहमद अकबर आबादी) तथापि मुसलमान विवाहीत स्त्रिया तर तशापण हरामच आहेत. तथापि काफिर स्त्रियापण हराम आहेत; याशिवाय की त्या मुसलमानांच्या मालकीत येऊन जाव्यांत. या स्वरूपांत गर्भाशय खाली झाल्यानंतर, त्या यांच्यासाठी हलाल आहेत.

२) म्हणजे कुरआनाने व हदीसीने निषीद्ध केलेल्या उल्लेखित स्त्रियांशिवाय दुसऱ्या स्त्रियांशी लग्न करणे जाएज (योग्य) आहे. या अटीवर की चार गोष्टी यात असाव्यात; प्रथम हे की (अन् तब्तगु) म्हणजे दोन्हीकडून इजाब आणि कबूल (मान्यता व कबुली) असावा. दुसरे हे की, माल म्हणजे मेहेर देण्याला कबूल करणे. तिसरे हे की, त्यांना लग्नाचे बंधनांत (म्हणजे हमेशासाठी कबज्यात राहणे) आणणेचा उद्देश असावा; फक्त वासनापूर्ती नसावी. (जसे व्याभिचारात किंवा त्या 'मुतअ' मध्ये, जो शियांमध्ये चालू आहे, म्हणजे वासनापूर्तीच्या समाधानासाठी थोड्या दिवसांचा किंवा थोड्या तासांचा निकाह) चौथे असे की, लपून छपून केलेले प्रेमसंबंध नसावेत. परंतु साक्षीदारांच्या उपस्थितीत निकाह केला जावा. या चारही अटी या महावाक्याने घेतल्या आहेत. याच्याने जेथे शियांच्या 'मुतआ' चे खंडन होते (तेथे) अहनाफ मध्ये चालू असलेल्या 'हलाला' चे पण अयोग्य होणे सिद्ध होते. कारण की, याचा उद्देशपण स्त्रीला कायमस्वरूपी निकाहच्या बंधनात आणणे हा नसतो. परंतु तात्कालिक फक्त एका रात्रीसाठी ठरविलेले आणि काल्पनिक करार केलेले असेत.

३) ही त्या आदेशाची ताकीद आहे की, ज्या स्त्रियांशी तुम्ही शरीअतप्रमाणे निकाहच्या मार्गाने आनंद प्राप्त कराल, त्यांना त्यांचा ठरविलेला मेहेर जरूर अदा करा.

४) यात आपसातल्या राजीखुषीने, 'मेहेर' मध्ये कमी जास्त करण्याचा अधिकार देण्यात आला आहे.

**मलहुजा :** 'इस्तिम्ताअ' च्या शब्दाने शिया लोक 'मुतआ' ला सिद्ध करतात; वास्तविक याच्याने अभिप्रेत निकाहनंतरचा सहवास आणि संभोगाचा 'इस्तिम्ताअ' आहे. जसे की, आम्ही पूर्वीच सांगितले. तथापि 'मुतआ' इस्लामच्या सुरवातीच्या काळांत जाएज (योग्य) राहिला आहे. आणि त्याचे योग्य होणे या महावाक्यावर आधारित नव्हते; परंतु त्या रिवाजाच्या आधारावर होता, जो इस्लामच्या पूर्वी चालत आला होता. मग नबी ﷺ नी अगदी स्पष्ट शब्दात त्याला कयामतपर्यंत हराम ठरवून दिले. जशी की सहीह हदीसीमध्ये याचा तपशील आलेला आहे.

५) याच्याने ठाऊक झाले की, दासीचा मालक हाच दासीचा वली (सरंक्षक) आहे. दासीचे कोण्या जागी लग्न याच्या परवानगी शिवाय केले जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे गुलामसुद्धा आपल्या मालकाच्या परवानगी शिवाय कोण्या ठिकाणी लग्न करू शकत नाही.

६) म्हणजे दासींना शंभराच्या (१००) ऐवजी (अर्धे म्हणजे) पन्नास कोड्यांची शिक्षा दिली जाईल; जणू त्यांच्यासाठी धोंडमाराची शिक्षा नाही; कारण की, ती अर्धी होऊ शकत नाही.

७) म्हणजे दासींशी लग्न करण्याची परवानगी, अशा लोकांसाठी आहे, जे तारूण्याच्या भावनांना आवर घालू शकत नाहीत आणि कुकर्मात व्यस्त होण्याची त्यांना भीती असेल आणि अशी भीती नसेल, तर त्यावेळ पोवेतो सहनशिलता पत्करणे चांगले आहे की, स्वतंत्र आणि खानदानी स्त्रीशी लग्न करण्यास योग्य न होऊन जाईल.

وَاللّٰهُ يُرِيْدُ اَنْ يَّتُوْبَ عَلَيْكُمْ ۫ وَيُرِيْدُ الَّذِيْنَ يَتَّبِعُوْنَ الشَّهَوٰتِ اَنْ تَمِيْلُوْا مَيْلًا عَظِيْمًا ﴿٢٧﴾

आणि अल्लाह इच्छितो की, तुमचा पश्चात्ताप मान्य करावा; आणि जे लोक आपल्या मनोकामनेचे अनुकरण करणारे आहेत; ते इच्छितात की, तुम्ही त्याच्यापासून फार दूर होऊन जावे[१] (२७)

يُرِيْدُ اللّٰهُ اَنْ يُّخَفِّفَ عَنْكُمْ ۚ وَخُلِقَ الْاِنْسَانُ ضَعِيْفًا ﴿٢٨﴾

अल्लाह इच्छितो की, तुमच्यावरून ओझे कमी करून टाकावे कारण की, मनुष्य (फार) दुर्बल निर्माण केला गेला आहे[२] (२८)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَاْكُلُوْۤا اَمْوَالَكُمْ بَيْنَكُمْ بِالْبَاطِلِ اِلَّاۤ اَنْ تَكُوْنَ تِجَارَةً عَنْ تَرَاضٍ مِّنْكُمْ ۫ وَلَا تَقْتُلُوْۤا اَنْفُسَكُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ بِكُمْ رَحِيْمًا ﴿٢٩﴾

हे ईमानवाल्यांनो! आपली आपसातील संपत्ती, अयोग्य प्रकारे[३] खाऊन टाकू नका. परंतु असे की तुमच्या आपसातील राजीखुषीने खरेदी आणि विक्री[४] करावी. आणि स्वत:ला ठार करू नका[५]. खचितच् अल्लाहतआला तुमच्यावर फारच मेहेरबान आहे (२९)

وَمَنْ يَّفْعَلْ ذٰلِكَ عُدْوَانًا وَّظُلْمًا فَسَوْفَ نُصْلِيْهِ نَارًا ؕ وَكَانَ ذٰلِكَ عَلَى اللّٰهِ يَسِيْرًا ﴿٣٠﴾

आणि जो मनुष्य जोर जुलुमाने असे काम करील[६]; तर लवकरच आम्ही त्याला अग्नीत दाखल करू; आणि अल्लाहतआलाला हे फारच सोपे आहे (३०)

اِنْ تَجْتَنِبُوْا كَبَآئِرَ مَا تُنْهَوْنَ عَنْهُ نُكَفِّرْ عَنْكُمْ سَيِّاٰتِكُمْ وَنُدْخِلْكُمْ مُّدْخَلًا كَرِيْمًا ﴿٣١﴾

जर तुम्ही या मोठ्या पातकापासून वाचत रहाल, ज्यांच्यापासून तुम्हास मना करण्यात येत आहे[७]; तर आम्ही तुमचे छोटे अपराध तुमच्यापासून दूर करून टाकू आणि तुम्हास सन्मान आणि प्रतिष्ठेच्या जागी दाखल करून देऊ (३१)

وَلَا تَتَمَنَّوْا مَا فَضَّلَ اللّٰهُ بِهٖ بَعْضَكُمْ عَلٰى بَعْضٍ ؕ لِلرِّجَالِ نَصِيْبٌ مِّمَّا اكْتَسَبُوْا ؕ وَلِلنِّسَآءِ نَصِيْبٌ مِّمَّا اكْتَسَبْنَ ؕ وَسْـَٔلُوا اللّٰهَ مِنْ فَضْلِهٖ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ بِكُلِّ شَىْءٍ عَلِيْمًا ﴿٣٢﴾

आणि अल्लाहतआलाने तुम्हाला एकांतून दुसऱ्यांवर जी श्रेष्ठता देऊन ठेवली आहे, तिची हाव धरू नका. पुरूषांच्या वाट्याला तेच आहे, जे त्यांनी कमाविले आणि स्त्रियांच्या वाट्याला तेच आहे जे त्यांनी कमाविले.आणि अल्लाहतआलाजवळ त्याची कृपा मागा[८]. खचितच् अल्लाहतआला प्रत्येक वस्तूचा जाणणारा आहे (३२)

وَلِكُلٍّ جَعَلْنَا مَوَالِىَ مِمَّا تَرَكَ الْوَالِدٰنِ وَالْاَقْرَبُوْنَ ؕ وَالَّذِيْنَ عَقَدَتْ اَيْمَانُكُمْ فَاٰتُوْهُمْ نَصِيْبَهُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَلٰى كُلِّ شَىْءٍ شَهِيْدًا ﴿٣٣﴾

आईबाप किंवा नातेवाईक, जे सोडून मरतील, त्याचे वारस आम्ही प्रत्येक व्यक्तीला निश्चित करून दिले आहेत[९] आणि ज्यांना तुम्ही आपल्या हाताने वचन दिले आहे, त्यांना त्यांचा वाटा द्या[१०]! वास्तविक अल्लाहतआला प्रत्येक वस्तुवर साक्ष आहे (३३)

१) 'अन् तमीलू' म्हणजे सत्याकडून निरर्थक गोष्टीकडे वळून जाल.

२) या दुर्बलतेच्या कारणाने, त्यांच्या पातकांत व्यस्त होऊन जाण्याची भीती जास्त आहे. म्हणून अल्लाहतआलाने शक्य असलेल्या सोप्या गोष्टी, सांगितल्या आहेत. त्यातूनच एक दासींबरोबर लग्न करण्याची परवानगी आहे. काहींनी या दुर्बलतेचा संबंध स्त्रियांबाबत दाखवला आहे. म्हणजे स्त्रीच्या बाबतीत पुरूष दुर्बल आहे; म्हणून स्त्रियासुद्धा कमी बुद्धीवान असून सुद्धा त्याला सहजरित्या आपल्या जाळ्यांत फसवून टाकतात.

३) 'बिलबातील' मध्ये, धोका, फसविणे, बनवेगिरी, भेसळी शिवाय, ते सर्व व्यवहारपण सामील आहेत, ज्यांना धर्मशास्त्राने मना केले आहे. जसे जुगार व व्याज वगैरे. अशा रीतीने मना केलेल्या आणि हराम वस्तूंचा व्यवहार करणेपण बातीलमध्ये सामील आहे.

४) याच्यासाठी सुद्धा अट अशी आहे की, हे देणेघेणे हलाल वस्तूंचे असावे. हराम वस्तूंचा कारभार, आपसातल्या राजीखुषीने सुद्धा अयोग्य राहील. याशिवाय संमतीमध्ये बैठकीच्या वर्तुळाचा मसला (प्रश्न) पण येतो, म्हणजे जो पर्यंत एक दुसऱ्यापासून वेगळे होणार नाहीत. व्यवहार रद्द करण्याचा अधिकार राहील. जसे की हदीसमध्ये आहे, ''दोघाआपसात सौदा करणाऱ्यांना, जोपर्यंत वेगळे होणार नाही, (रद्द करण्याचा) अधिकार आहे.'' (सहीह बुखारी व स. मुस्लीम)

५) याच्याने अभिप्रेत आत्महत्यापण असूशकते; जी कबीरा गुनाह (मोठेपाप) आहे. आणि गुनाह करण्याचा प्रयत्न पण जे बर्बादीचे कारणपण आहे. आणि कोण्या मुसलमानाला ठार करणे सुद्धा कारण की, मुसलमान एका शरीराप्रमाणे आहे. म्हणून त्याचा वधपण असाच आहे; जसे स्वत:ला ठार केले.

६) म्हणजे ज्या गोष्टीपासून मना करण्यात आले आहे; ते काम जाणून बुजून जोर जुलुमाने करील.

७) कबीरा गुनाहच्या (मोठ्या पापांच्या) व्याख्येत मतभेद आहे. काहींजवळ ते गुनाह आहेत. ज्यांवर हद्द (शिक्षा जी इस्लामी शरिअत नुसार दिली जाईल.) निश्चित आहे. काहींच्या जवळ ते गुनाह ज्यांच्यावर कुरआनात किंवा हदीसमध्ये कडक शिक्षा देण्याची धमकी किंवा धिक्कार आलेला आहे. काही म्हणतात, प्रत्येक ते काम ज्यापासून अल्लाहने किंवा त्याच्या

पैगंबराने निषीद्ध म्हणून मना केले असेल; आणि वास्तव हे आहे की, त्यातून कुठली एक गोष्टपण कुणी गुन्ह्यात आढळून आली, तर तो कबीरा (म्हणजे मोठा गुनाह) आहे. हदीसमध्ये निरनिराळ्या मोठ्या गुन्ह्यांचे वर्णन आले आहे. ज्यांना काही उलमांनी (धर्मपंडीतांनी) एका पुस्तकात जमापण केले आहे. जसे 'अल कबाईर लिज्जहबी वगैरे. या ठिकाणी हे तत्त्व अंगिकारण्यात आले आहे की, जो मुसलमान कबीरा गुन्ह्यांपासून (उदाहरणार्थ शिर्क आईवडीलांना त्रास देणे, खोटे बोलणे वगैरे) स्वत:ला वाचवील, तर आम्ही त्याचे छोटे गुन्हे माफ करून टाकू. सू. नजममध्ये सुद्धा हा विषय वर्णन केला गेला आहे. तथापि तेथे मोठ्या गुन्ह्यांबरोबर निर्लज्जपणाच्या कामापासून वाचण्याला पण छोट्या गुन्ह्यांच्या माफीसाठी आवश्यक ठरविण्यात आले आहे. याशिवाय छोट्या गुन्ह्यांवर अडून राहणे व वारंवार करण्याने सुद्धा छोट्या गुन्ह्यांना ते मोठे गुन्हे बनवून टाकतात. याचप्रमाणे मोठ्या गुन्ह्यांपासून वाचण्याबरोबर इस्लामी आदेशांची आणि अनिवार्यतेची पाबन्दी (नित्यनेमाने करणे) आणि सुकृत्ये करणे पण फार आवश्यक आहे. सहाबा किराम ﷺ नी धर्मशास्त्राच्या या वैशिष्ट्याला (मिजाज) समजून घेतले होते, म्हणून त्यांनी फक्त माफीच्या वायद्यावरच भिस्त ठेवली नव्हती, जेव्हा की, अल्लाहच्या क्षमा आणि दयेला खात्रीपूर्वक मिळविण्यासाठी वर उल्लेख केलेल्या सर्व गोष्टी पार पाडल्या परंतु आम्ही कर्माच्या नांवावर शून्य आहोत, परंतु आमची अंत:करणे आशा आणि आकांक्षांनी भरपूर आहेत.

८) याच्या अवतरण्याच्या कारणात दाखविण्यात आले आहे की, ह.उम्मे सलमा ﷺ नी म्हटले की, पुरूष 'जिहाद' मध्ये भाग घेतात आणि हौतात्म्य पत्करतात. आम्ही स्त्रिया या श्रेष्ठत्व देणाऱ्या कामांपासून वंचित आहोत. आमची मिरासपण पुरूषांपेक्षा निम्मे आहे. यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (मुसनद अहमद) अल्लाहतआलाच्या या आदेशाचा अर्थ हा आहे की पुरूषांना अल्लाहतआलाने जे शरीर सामर्थ्य आणि शक्ती आपल्या युक्ती आणि इरादाप्रमाणे दिलेली आहे आणि ज्याच्या आधारावर ते जिहादपण करतात आणि दुसऱ्या दूरवरच्या कामांत भाग घेतात; ही त्यांच्यासाठी अल्लाहची खास देणगी आहे. यांना पाहून स्त्रियांना पुरूषी लायकीच्या कामे करण्याची इच्छा करावयास नको. तथापि अल्लाहतआलाचे आज्ञापालन आणि पुण्याच्या कामांत भरपुर हिस्सा घेतला पाहिजे. आणि या क्षेत्रांत त्या जी काही कमाई करतील पुरूषांप्रमाणे त्यांना त्याचा पुरेपुर मोबदला मिळेल. याशिवाय अल्लाहतआलाजवळ त्याची कृपा मागितली पाहिजे. कारण की, पुरूषांआणि स्त्रियांदरम्यान नैसर्गिक लायकी आणि कार्यक्षमतेत जो फरक आहे; तर तो निसर्गाचा न टाळता येणारा निर्णय आहे. जो निव्वळ आकांक्षेने बदलला जाऊ शकत नाही. परंतु त्याच्या कृपेने कौशल्य आणि मेहनतीत राहून जाणाऱ्या कमतरतेची भरपाई होऊ शकते.

९) 'मवालिया' 'मौला' चे अनेकवचन आहे. मौलाचे कित्येक अर्थ आहेत. मित्र,स्वतंत्र केलेला गुलाम, चुलत शेजारी. परंतु येथे याच्याने अभिप्रेत विरसा आहे. अर्थ असा आहे की, प्रत्येक पुरूष स्त्री जे काही सोडून जाईल, त्याचे वारस त्यांचे आईबाप आणि दुसरे जवळचे नातेवाईक होतील.

१०) या महावाक्याच्या आदेशित किंवा रद्द होण्याच्या बाबतीत भाष्यकारांचा मतभेद आहे. इब्ने जरीर तबरी वगैरे याला रद्द न झालेले (आदेशीत) मानतात आणि 'अयमानुकुम्' (वचन,करार) ने अभिप्रेत त्याच वचन आणि करार घेतात जो एक दुसऱ्याच्या मदतीसाठी इस्लामपूर्वी दोन व्यक्ती किंवा दोन घराण्यात झाला; आणि इस्लामनंतर पण तो चालूच राहीला होता. 'नसीबहुम्' (वाटा) ने अभिप्रेत यांच कराराच्या पाळण्यासंबंधात मदत आणि सहकार्याचा वाटा आहे. आणि इब्ने कसीर आणि दुसऱ्या भाष्यकारांजवळ हे महावाक्य रद्द (मनसुख) आहे. कारण की,'अयमानुकुम्' ने त्यांच्याजवळ तो करार आहे, जो हिजरतनंतर एक अन्सारी आणि मुहाजिरच्या मध्ये, भाऊ भाऊ होण्याच्या संदर्भात झाला होता. यांच्यात एक मुहाजिर अन्सारीच्या संपत्तीचा त्याच्या नातेवाईकांऐवजी वारस होत असे, परंतु ही कारण की तात्पुरती व्यवस्था होती, ''नाते वाईक अल्लाहच्या हुकूमाप्रमाणे एक दुसऱ्याचे जास्त हकदार आहेत.'' (सू. अन्फाल - ७५) अवतरीत करून याला रद्द करून टाकले. आता 'फआतुहुम नसीबहुम' ने अभिप्रेत मैत्री व प्रेम आणि एक दुसऱ्याची मदत आहे आणि मृत्यूपत्राप्रमाणे काही देऊन टाकणे पण यांत सामील आहे. धर्म पंडीताच्या एका समूहाने याच्याने अभिप्रेत अशा दोन व्यक्तींना घेतले आहे, ज्यांच्यापासून कमीत कमी एक 'लावारिस' (वारीस नसलेला) असावा आणि एक दुसऱ्या व्यक्तीशी हे निश्चित करतो की, मी तुमचा मित्र आहे. जर मी काही अपेक्षा करीन तर माझी मदत करावी आणि जर मी मारला जाईल तर माझे प्राणमूल्य (दियत) घ्यावे. या लावारिसचा मृत्यू झाल्यानंतर त्याची संपत्ती वर उल्लेख केलेली व्यक्ती घेईल. या अटीवर की, खरोखरच त्याचा कुणी वारस नसेल; काही दुसऱ्या धर्मपंडितांनी या महावाक्याचा एक आणखी अर्थ सांगितला आहे. ते म्हणतात की,'वल्लजीना अकदत अयमानुकुम' ने अभिप्रेत पती पत्नी आहेत. आणि याचा 'अत्फ ' 'अल् अकरबून' वर आहे. अर्थ असा की, ''आईबापांनी, नातेवाईकांनी, आणि ज्यांना तुमचा करार व मदार आपसात बंधनकारक आहेत; (म्हणजे पती किंवा पत्नी) त्यांनी जे काही मागे सोडले, त्याचे हक्कदार म्हणजे वाटेकरी, आम्ही निश्चित करून दिले आहेत. म्हणून त्या हक्कदारांना त्यांचे वाटे देऊन टाका.'' म्हणजे मागील मिरासच्या महावाक्या, तपशीलाने जे वाटे वर्णन केले गेले होते; येथे एकत्रितरित्या त्यांना अदा करण्याची पुन्हा ताकीद केली गेली आहे.

ٱلرِّجَالُ قَوَّٰمُونَ عَلَى ٱلنِّسَآءِ بِمَا فَضَّلَ ٱللَّهُ بَعۡضَهُمۡ عَلَىٰ
بَعۡضٖ وَبِمَآ أَنفَقُواْ مِنۡ أَمۡوَٰلِهِمۡۚ فَٱلصَّٰلِحَٰتُ
قَٰنِتَٰتٌ حَٰفِظَٰتٞ لِّلۡغَيۡبِ بِمَا حَفِظَ ٱللَّهُۚ وَٱلَّٰتِي
تَخَافُونَ نُشُوزَهُنَّ فَعِظُوهُنَّ وَٱهۡجُرُوهُنَّ فِي
ٱلۡمَضَاجِعِ وَٱضۡرِبُوهُنَّۖ فَإِنۡ أَطَعۡنَكُمۡ فَلَا تَبۡغُواْ
عَلَيۡهِنَّ سَبِيلًاۗ إِنَّ ٱللَّهَ كَانَ عَلِيّٗا كَبِيرٗا ٣٤

पुरूष स्त्रियांवर अधिकारी आहेत; या कारणाने की, अल्लाहतआलाने एकाला दुसऱ्यावर श्रेष्ठत्व दिले आहे आणि या करीता की, पुरूषांनी आपले धन खर्च केले आहे[१]; मग सदाचरणी आज्ञाधारक स्त्रिया पतीच्या गैरहजेरीत अल्लाहच्या संरक्षणात आपल्या नजराखाली ठेवणाऱ्या आहेत आणि ज्या स्त्रियांकडून आज्ञाभंगाची आणि अहंमन्येतेची भीती असेल, त्यांना उपदेश करा आणि त्यांना वेगळ्या बिछान्यात सोडून द्या. आणि त्यांना मारून शिक्षा करा, मग जर त्या आज्ञापालन करू लागतील, तर त्यांच्यावर (ठपका) ठेवण्याचा मार्ग शोधू नका[२]. नि:संशय अल्लाहतआला अती महीमाशाली व मोठा श्रेष्ठ आहे ३४

وَإِنۡ خِفۡتُمۡ شِقَاقَ بَيۡنِهِمَا فَٱبۡعَثُواْ حَكَمٗا مِّنۡ
أَهۡلِهِۦ وَحَكَمٗا مِّنۡ أَهۡلِهَآ إِن يُرِيدَآ إِصۡلَٰحٗا
يُوَفِّقِ ٱللَّهُ بَيۡنَهُمَآۗ إِنَّ ٱللَّهَ كَانَ عَلِيمًا خَبِيرٗا ٣٥

जर तुम्हास पतीपत्नीमध्ये बिघाडाचा अंदेशा असेल, तर एक पंच पतीवाल्यांकडून आणि एक पत्नीच्या घरातील लोकांमधून[३] निश्चित करून घ्या. जर हे दोघे समेट घडवू इच्छतील, तर अल्लाह दोघांत मिलाप करवून देईल. खचितच् अल्लाहतआला पूर्ण वाकबगार आणि खबरदार आहे. ३५

وَٱعۡبُدُواْ ٱللَّهَ وَلَا تُشۡرِكُواْ بِهِۦ شَيۡـٔٗاۖ وَبِٱلۡوَٰلِدَيۡنِ
إِحۡسَٰنٗا وَبِذِي ٱلۡقُرۡبَىٰ وَٱلۡيَتَٰمَىٰ وَٱلۡمَسَٰكِينِ
وَٱلۡجَارِ ذِي ٱلۡقُرۡبَىٰ وَٱلۡجَارِ ٱلۡجُنُبِ وَٱلصَّاحِبِ
بِٱلۡجَنۢبِ وَٱبۡنِ ٱلسَّبِيلِ وَمَا مَلَكَتۡ أَيۡمَٰنُكُمۡۗ
إِنَّ ٱللَّهَ لَا يُحِبُّ مَن كَانَ مُخۡتَالٗا فَخُورًا ٣٦

आणि अल्लाहतआलाची उपासना करा; आणि त्याचे बरोबर कोणाला शरीक करू नका. आई बापाशी परोपकाराचे वर्तन करा. आणि नातेवाईकांशी, अनाथांशी आणि गरीबांशी आणि नातवाईक शेजारी आणि गैर नातेवाईक शेजारी[४] आणि सोबत असणाऱ्या साथीदारांशी[५] आणि वाटसरूंशी आणि त्यांच्याशी ज्यांचे मालक तुम्ही आहांत (गुलाम आणि दासी[६]) त्या सर्वांशीही. खचितच् अल्लाहतआला अहंकार करणाऱ्यांना व शेखी मिरवणाऱ्यांना पसंत करीत नाही[७] ३६

ٱلَّذِينَ يَبۡخَلُونَ وَيَأۡمُرُونَ ٱلنَّاسَ بِٱلۡبُخۡلِ
وَيَكۡتُمُونَ مَآ ءَاتَىٰهُمُ ٱللَّهُ مِن فَضۡلِهِۦۗ وَأَعۡتَدۡنَا
لِلۡكَٰفِرِينَ عَذَابٗا مُّهِينٗا ٣٧

जे लोक स्वत: कंजुषी करतात, आणि दुसऱ्यांना पण कंजुषी करावयास सांगतात. आणि अल्लाहतआलाने जी आपली कृपा त्यांना देऊन ठेवली आहे, तिला लपवून ठेवतात. आम्ही अशा काफिरांसाठी फजितीची शिक्षा तयार करून ठेवली आहे ३७

وَٱلَّذِينَ يُنفِقُونَ أَمۡوَٰلَهُمۡ رِئَآءَ ٱلنَّاسِ وَلَا يُؤۡمِنُونَ
بِٱللَّهِ وَلَا بِٱلۡيَوۡمِ ٱلۡأٓخِرِۗ وَمَن يَكُنِ ٱلشَّيۡطَٰنُ لَهُۥ قَرِينٗا
فَسَآءَ قَرِينٗا ٣٨

आणि जे लोक आपले धन लोकांना दाखविण्यासाठी खर्च करतात; आणि अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर विश्वास ठेवत नाही; आणि ज्याचा सोबती आणि साथी शैतान असेल[८]; तो अत्यंत वाईट साथी होय ३८

وَمَاذَا عَلَيۡهِمۡ لَوۡ ءَامَنُواْ بِٱللَّهِ وَٱلۡيَوۡمِ ٱلۡأٓخِرِ وَأَنفَقُواْ
مِمَّا رَزَقَهُمُ ٱللَّهُۚ وَكَانَ ٱللَّهُ بِهِمۡ عَلِيمًا ٣٩

त्यांचे काय नुकसान होते बरे! जर ते अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसांवर विश्वास ठेवते; आणि अल्लाहतआलाने जे त्यांना देऊन ठेवले आहे (त्यांतून) त्याच्या नावावर देते; अल्लाहतआला त्यांना खूप चांगल्याप्रकारे जाणून आहे ३९

إِنَّ ٱللَّهَ لَا يَظۡلِمُ مِثۡقَالَ ذَرَّةٖۖ وَإِن تَكُ حَسَنَةٗ
يُضَٰعِفۡهَا وَيُؤۡتِ مِن لَّدُنۡهُ أَجۡرًا عَظِيمٗا ٤٠

नि:संशय अल्लाहतआला एका कणाबरोबर (देखील) जुलूम करीत नाही. आणि जर पुण्य असेल तर त्याला दुप्पट करून देतो. आणि विशेष आपल्याकडून फार मोठे प्रतिफळ देतो ४०

१) यात पुरूषाने अधिकार व स्त्रीवर श्रेष्ठत्वाची दोन कारणे वर्णन केली आहेत. एक निसर्गदत्त आहे, जो पुरूषी सामर्थ्य आणि बौद्धीक क्षमता आहे. ज्यात स्त्री पुरूषांत नैसर्गिक रित्या विभीन्न आहे. दुसरे कारण कौशल्य आहे. ज्याला शरिअत ने पुरूषाला जबाबदार बनविले आहे. आणि स्त्रीला तिचे नैसर्गिक दौर्बल्य आणि खास शिक्षणाच्या कारणाने जे इस्लामने स्त्रीचे शील आणि लज्जा आणि तिच्या पावित्र्याच्या संरक्षणासाठी आवश्यक दाखविण्यात

आली आहे. स्त्रीला रोजी कमविण्याच्या झंझटपासून दूर ठेवले आहे. स्त्रीला तिच्या राष्ट्रीय नेतृत्व विरुद्ध कुरआन करीमचे पूर्ण आदेश बिलकुल स्पष्ट आहे. ज्याचे समर्थन सहीह बुखारीच्या त्या हदीसीने होते, ज्यांत नबी ﷺ नी फरमाविले, ''तो समाज कधीच यशस्वी होणार नाही, ज्याने आपली राष्ट्रीय कामे एका स्त्रीच्या हवाली करून दिली.'' (स.बुखारी)

२) आज्ञाभंगाच्या स्थितीत स्त्रीला समजाविण्यासाठी सर्वप्रथम उपदेश करण्याचा क्रमांक आहे. दुसऱ्या क्रमांकावर तात्कालिक आणि थोड्या काळापुरते वेगळे करणे आहे. जी समजदार स्त्रीसाठी मोठी तंबी आहे. यानेही जर ती समजणार नाही, तर हल्का मार देण्याची परवानगी आहे. परंतु हा मार पाश्विक आणि क्रूर नसावा. जशी की अडाणी लोकांची वागणूक आहे. अल्लाहतआलाने आणि त्यांच्या पैगंबरांनी, अशा अत्याचाराची परवानगी कोण्या पुरूषाला दिलेली नाही. जर त्या सुधारणा करून घेतील, तर आणखी एखादा मार्ग शोधू नका; म्हणजे मारपीट करू नका, तंग करू नका, किंवा तलाक देऊ नका. जणू तलाक ही अगदी शेवटची पायरी आहे; जर काही आणखी उपाय बाकी राहणार नाही; परंतु पुरूष या हक्काला पण फार अयोग्य रीतीने उपयोगांत आणत आहे; आणि जरा जराश्या गोष्टीवर लगेच तलाक देऊन टाकतात आणि आपले स्वतःचे जीवन, स्त्रीचे जीवन आणि मुलाबाळांचे जीवन बर्बाद करून टाकतात.

३) घरातल्या घरांत, उल्लेखित तिन्ही उपायांचा उपयोग झाला नाही. तर हा चौथा उपाय आहे आणि याच्या बाबतीत सांगण्यात आले की, पंच जर प्रमाणिक असतील तर, खचितच् त्यांच्या समेट घडवण्याचा प्रयत्न यशस्वी होईल. तथापि अपयश आल्यास समेट घडविणाऱ्यांना तलाकचा अधिकार आहे किंवा नाही? यात धर्मपंडीतात मतभेद आहे. काही याला, ज्या अधिकाऱ्याला अधिकार दिला आहे त्याचा आदेश, किंवा दाम्पत्यांचे वेगळे होण्यासाठी वकील बनवणे, यांचेसह सशर्त केले आहे. आणि बहुतेक उलमा (धर्मपंडीत) याच्याशिवाय या अधिकाराला मान्य करतात. (तपशिलासाठी कृपया पहावे, तफसीरि तबरी, फत्हुल कदीर आणि तफसीर इब्ने कसीर)

४) 'अलजारिल जुनुब' नातेवाईक, शेजाऱ्याच्या तुलनेत उपयोगांत आणण्यात आला आहे; ज्याचा अर्थ आहे असा शेजारी ज्याचेशी, नातेसंबंध नसतील. याचा अर्थ असा की, शेजाऱ्याशी, शेजारी म्हणून परोपकाराची वतर्णूक केली जावी. तो नातेवाईक असो किंवा नसो. ज्याप्रमाणे हदीसीमध्ये सुद्धा याची फारच ताकीद करण्यात आली आहे.

५) याने अभिप्रेत सहप्रवासी, कामातला सहभागी, पत्नी आणि ती व्यक्ती आहे, जो फायद्याच्या आशेवर कोणाची जवळीक आणि सोबत अंगिकार करेल. परंतु, याच्या व्याख्येत ते लोक पण येऊ शकतात; ज्यांना ज्ञान प्राप्त करण्यासाठी, किंवा कुणी काम शिकण्यासाठी किंवा कोण्या कारभाराच्या अनुषंगाने तुमच्याजवळ बसण्याची संधी मिळेल. (फत्हुल कदीर)

६) यात, घर दुकान, कारखाने आणि मिला यांतील नोकर-चाकर पण येतात. सेवकांबरोबर सुद्धा परोपकाराची वर्तणूक करण्याची मोठी ताकीद हदीसीमध्ये आलेली आहे.

७) अहंकार,शेखी व गर्व अल्लाहतआलाला फारच नापसंत आहे; किंबहुना एका हदीसीमध्ये इथपावेतो आलेले आहे, ''तो मनुष्य स्वर्गात प्रवेश करणार नाही, ज्याच्या मनांत राईच्या एका दाण्याबरोबर जरी अहंकार असेल.'' (स.मुस्लीम, किताबुल ईमान) येथे अहंकाराच्या विशेष निर्भत्सनेने हा उद्देश आहे की, अल्लाहतआलाची उपासना आणि ज्या ज्या लोकांशी परोपकाराची वर्तणूक करण्याची ताकीद केली गेली आहे. त्यावर अंमलबजावणी तोच माणूस करू शकतो; ज्याचे मन अहंकारापासून खाली असेल. अहंमन्य आणि गर्विष्ठ माणूस खऱ्या अर्थाने उपासनेचा हक्क अदा करू शकत नाही, तसेच आपल्या आणि परक्या बरोबर परोपकारांची वर्तणूक करू शकत नाही.

८) कंजुषी (म्हणजे अल्लाहच्या मार्गात खर्च न करणे) किंवा खर्च तर करावयाचा पण लोकांना दाखविण्यासाठी करायचा. या दोन्ही गोष्टी अल्लाहतआलाला फारच नापसंत आहेत. आणि त्यांच्या निर्भत्सनेला एवढीच गोष्ट पुरेशी आहे की, येथे कुरआन करीमने या दोन्ही गोष्टींना काफिरांची पद्धत आणि त्या लोकांची कार्यपद्धती सांगण्यात आली आहे, जे अल्लाह आणि शेवटच्या दिवसांवर विश्वास ठेवत नाही आणि शैतान त्यांचा सोबती आहे.

فَكَيْفَ اِذَا جِئْنَا مِنْ كُلِّ اُمَّةٍ بِشَهِيْدٍ وَّجِئْنَا بِكَ عَلٰى هٰٓؤُلَآءِ شَهِيْدًا ﴿٤١﴾

मग काय अवस्था होईल, ज्यावेळी प्रत्येक समुदायातून आम्ही एक साक्षीदार आणू आणि आपणास त्या लोकांवर साक्षीदार बनवून आणू[१] ४१

يَوْمَئِذٍ يَّوَدُّ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَعَصَوُا الرَّسُوْلَ لَوْ تُسَوّٰى بِهِمُ الْاَرْضُ ؕ وَلَا يَكْتُمُوْنَ اللّٰهَ حَدِيْثًا ﴿٤٢﴾

ज्या दिवशी काफिर आणि पैगंबरांचे आज्ञाभंजक अपेक्षा करतील की, जर त्यांना मातीत गाडून जमीनदोस्त करून टाकले असते! आणि ते अल्लाहतआला कडून कुठलीही गोष्ट लपवू शकणार नाही ४२

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَقْرَبُوا الصَّلٰوةَ وَاَنْتُمْ سُكٰرٰى حَتّٰى تَعْلَمُوْا مَا تَقُوْلُوْنَ وَلَا جُنُبًا اِلَّا عَابِرِىْ سَبِيْلٍ حَتّٰى تَغْتَسِلُوْا ؕ وَاِنْ كُنْتُمْ مَّرْضٰٓى اَوْ عَلٰى سَفَرٍ اَوْ جَآءَ اَحَدٌ مِّنْكُمْ مِّنَ الْغَآئِطِ اَوْ لٰمَسْتُمُ النِّسَآءَ فَلَمْ تَجِدُوْا مَآءً فَتَيَمَّمُوْا صَعِيْدًا طَيِّبًا فَامْسَحُوْا بِوُجُوْهِكُمْ وَاَيْدِيْكُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَفُوًّا غَفُوْرًا ﴿٤٣﴾

हे ईमानवाल्यांनो! जेव्हा तुम्ही नशेत मस्त रहाल, (तेव्हा) नमाजीच्या जवळपण फिरकू नका[२], जोपर्यंत आपल्या बोलण्याला समजू न शकाल आणि कामप्रकोपाने विर्यपतन होऊन अपवित्र झाला असाल, तर जोपर्यंत स्नान न करून घ्याल[३]. परंतु वाटेने चालले जात असाल, तर वेगळी गोष्ट आहे[४] आणि जर तुम्ही आजारी असाल, किंवा प्रवासांत असाल किंवा तुमच्यातून कोणी शौचास जाऊन येईल किंवा तुम्ही स्त्रियांशी समागम केलेला असेल. आणि तुम्हास पाणी न मिळेल तर स्वच्छ मातीने 'तयम्मुम' करा; आणि आपले तोंडे व आपले हात चोळा[५]. नि:संशय अल्लाहतआला माफ करणारा आणि क्षमाशील आहे ४३

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْنَ اُوْتُوْا نَصِيْبًا مِّنَ الْكِتٰبِ يَشْتَرُوْنَ الضَّلٰلَةَ وَيُرِيْدُوْنَ اَنْ تَضِلُّوا السَّبِيْلَ ﴿٤٤﴾

काय तुम्ही त्यांना पाहिले नाही, ज्यांना पुस्तकाचा काही भाग देण्यात आला आहे; ते चुकीचा मार्ग खरीदी करीत आहे; आणि इच्छितात की, तुम्ही सुद्धा मार्गभ्रष्ट होऊन जावे ४४

وَاللّٰهُ اَعْلَمُ بِاَعْدَآئِكُمْ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ وَلِيًّا ۙ وَّكَفٰى بِاللّٰهِ نَصِيْرًا ﴿٤٥﴾

अल्लाहतआला तुमच्या शत्रूंना खूप चांगल्याप्रकारे जाणतो आणि अल्लाहतआलाचे मित्र होणे पुरेसे आहे आणि अल्लाहतआलाचे मददगार होणे पुरेसे आहे ४५

مِنَ الَّذِيْنَ هَادُوْا يُحَرِّفُوْنَ الْكَلِمَ عَنْ مَّوَاضِعِهٖ وَيَقُوْلُوْنَ سَمِعْنَا وَعَصَيْنَا وَاسْمَعْ غَيْرَ مُسْمَعٍ وَّرَاعِنَا لَيًّا بِاَلْسِنَتِهِمْ وَطَعْنًا فِى الدِّيْنِ ؕ وَلَوْ اَنَّهُمْ قَالُوْا سَمِعْنَا وَاَطَعْنَا وَاسْمَعْ وَانْظُرْنَا لَكَانَ خَيْرًا لَّهُمْ وَاَقْوَمَ ۙ وَلٰكِنْ لَّعَنَهُمُ اللّٰهُ بِكُفْرِهِمْ فَلَا يُؤْمِنُوْنَ اِلَّا قَلِيْلًا ﴿٤٦﴾

काही यहूदी शब्दांना त्यांच्या मूळ अर्थात हेरफेर करून टाकतात आणि म्हणतात की, आम्ही ऐकले आणि आज्ञाभंग केला; आणि ऐक, याच्याशिवाय की, तू ऐकला जावा[६]; आणि आमच्यावर मेहेरबानी कर, (परंतु या म्हणण्यात) आपल्या जिभेला वेडी वाकडी करतात; आणि धर्मांत कुटाळकी करतात. आणि जर हे लोक म्हणतात की, आम्ही ऐकले आणि आम्ही आज्ञापालन केले आणि आपण ऐका आणि आम्हांकडे पहा तर हे त्यांच्यासाठी उत्तम झाले असते, तर हे फारच योग्य झाले असते;परंतु अल्लाहतआलाने त्यांच्या 'कुफ्र' च्या कारणाने, त्यांना धुत्कारले आहे; म्हणून हे फारच कमी ईमान आणतात[७] ४६

१) प्रत्येक समूहातून एक पैगंबर, अल्लाहच्या समक्ष साक्ष देईल की, या अल्लाह! आम्ही तुझा संदेश, आपल्या समाजाला पोहचवून दिला होता. आता त्यांनी मान्य केले नाही तर त्यात आमचा काय कसूर? मग या सर्वांवर नबी करीम ﷺ साक्ष देतील की,या अल्लाह! हे खरे आहेत. आपण ﷺ ही साक्ष, कुरआनामुळे देतील, जे आपल्यावर अवतरीत झाले. आणि ज्यात मागे होऊन गेलेल्या पैगंबर आणि त्यांच्या समाजाची हकीकतपण आवश्यकते प्रमाणे वर्णन करण्यात आली आहे. ही एक कठीण अवस्था असेल. त्याची नुसती कल्पनाही थरकांप उडविणारी आहे. हदीसमध्ये येते की, एकदा नबी करीम ﷺ नी, ह.अब्दुल्लाह बिन मसऊद رضي الله عنه जवळ कुरआन ऐकण्याची इच्छा व्यक्त केली. ते ऐकवित ऐकवित जेव्हा या महावाक्यावर पोहचले तेव्हा आपण ﷺ नी फरमाविले, बस आता पुरे झाले. ह. इब्ने मसऊद رضي الله عنه म्हणतात. मी पाहिले आपण ﷺ च्या दोन्ही डोळ्यातून अश्रू वहात होते. (स.बुखारी फज़ाइलुल कुरआन) काही लोक म्हणतात की, साक्ष तोच देऊ शकतो, जो सर्व काही आपल्या डोळ्यांनी बघेन, म्हणून ते 'शहीद' चा अर्थ 'हाज़िर नाज़िर' चा करतात. आणि अशाप्रकारे, नबी ﷺ ला 'हाजिर नाजिर' ठरवतात. परंतु नबी ﷺ ला 'हाज़िर

नाज़िर' समजणे; हे आपणांस ﷺ अल्लाहच्या वैशिष्ट्यांत सामील करणे आहे; जे 'शिर्क' आहे. कारण की, 'हाज़िर नाज़िर' फक्त अल्लाहतआलाचे वैशिष्ट्य आहे. 'शहीद' च्या शब्दाने त्यांचा आधार घेणे आपल्यात कुणी सामर्थ्य बाळगत नाही. यासाठी की 'साक्ष' खात्रीशिर ज्ञानाच्या आधारावरपण असते. आणि कुरआन करीममध्ये वर्णन केलेल्या वास्तवांचे आणि घटनांचे जास्त विश्वासपात्र ज्ञान कोणाचे असू शकते? या विश्वासपात्र ज्ञानाच्या आधारावर स्वत: उम्मते मोहम्मदीयालापण कुरआनाने, ''साऱ्या विश्वाच्या लोकांवर साक्षीदार'' म्हटले आहे. जर साक्षीसाठी हाज़िर नाज़िर असणे आवश्यक आहे, तर मग उम्मते मोहम्मदीयाच्या प्रत्येक व्यक्तीला हाज़िर नाज़िर मानावे लागेल. म्हणूनच नबी ﷺ च्या बाबतीत ही श्रद्धा (अकीदा) 'शिर्क' वाली आणि काहीही आधार नसलेली आहे.

✪ हाजिर नाजिर :– म्हणजे प्रत्येक क्षणी, प्रत्येक ठिकाणी असणारा आणि प्रत्येक वस्तूला पाहणारा होय.

२) हा आदेश त्यावेळी देण्यात आला होता, जेव्हा आतापर्यंत मद्याची मनाई करण्यात आली नव्हती. म्हणून, एका जेवणाच्या आमंत्रणात मद्य प्याल्यानंतर, जेव्हा नमाजीसाठी उभे राहिले, तर नशेमध्ये कुरआनाचे शब्द, इमाम साहेब चुकीचे म्हणून गेले. (तपशीलासाठी पहावे, तिरमिझी, तफसीर सू.निसा) ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले की, नशेच्या स्थितीत नमाज पढत जाऊ नका. जणू, यावेळेपर्यंत मद्यप्राशन करून नमाजीजवळ जाण्यास मना करण्यांत आले. संपूर्ण मनाई आणि निषीद्धतेचा आदेश याच्यानंतर अवतरीत झाला. (हा मद्यासंबंधी दुसरा आदेश आहे.)

३) म्हणजे नापाकीच्या अवस्थेत सुद्धा नमाज पढू नका. कारण की नमाजीसाठी तहारत (पाकसाफ असणे) आवश्यक आहे.

४) याचा अर्थ असा नाही की, प्रवासाच्या काळांत जर पाणी मिळाले नाही, तर जनाबतच्या (विर्यपतनाच्या) स्थितीतच नमाज पढून घ्या; (जसे की काहींनी म्हटले आहे) परंतु बहुसंख्य उलमांजवळ, याचा खुलासा हा आहे की, जनाबतच्या स्थितीत तुम्ही मशिदीमध्ये बसू नका, तथापि मशिदीमधून चालत जाण्याची आवश्यकता पडली तर चालत जाऊं शकतात. काही सहाबा ﷺ ची घरे अशा तऱ्हेने होती की, तर त्यांना कुठल्याही प्रकारे मस्जिदे नबवीच्या मधूनच चालत जावे लागे. ही सवलत त्यांनाच दृष्टीसमोर ठेवून देण्यांत आली आहे. (इब्ने कसीर) आणि प्रवाशांकरता आदेश पुढे येत आहे.

५) आजाऱ्याने अभिप्रेत, तो आजारी आहे, (१) ज्याला वजू केल्याने नुकसान किंवा आजारपणात वाढ होण्याचा अंदेशा असेल (२) प्रवासी खर्च साधारण आहे लांबचा प्रवास किंवा लहानसा प्रवास असो, जर पाणी मिळाले नाही तर 'तयम्मुम' करण्याची परवानगी आहे. पाणी न मिळण्याच्या स्थितीत तर ही परवानगी स्थायिक माणसाला पण आहे. परंतु आजारी आणि प्रवाशाला अशा प्रकारची आवश्यकता सर्व साधारण येतेच; म्हणून खास त्यांच्यासाठी परवानगी वर्णन करण्यांत आली आहे. (३) शौचाला जाऊन आलेला. ४) आणि पत्नीशी समागम करणारा, यांना पण पाणी न मिळण्याच्या स्थितीत, तयम्मुम करून नमाज पढण्याची परवानगी आहे. तयम्मुम ची पद्धत अशी आहे की, एकच वेळी हात जमिनीवर मारून, मनगटापर्यंत दोन्ही हात एक दुसऱ्यांवर फिरवून घेणे; (कोपरा पर्यंत जरूरी नाही) आणि चेहऱ्यावर पण फिरवून घ्यावा. नबी ﷺ नी 'तयम्मुम' च्या बाबतीत म्हटले, की, ''हे दोन्ही तळहात चेहऱ्याकरीता एकच वेळा मारणे आहे.'' (मुसनद अहमद) सअीदन तैय्यबाने अभिप्रेत पाकसाफ माती आहे. जमिनीपासून निघणारी प्रत्येक वस्तू नाही. जशी की काहींचा विचार आहे. हदीसमध्ये याचे आणखी स्पष्टीकरण करून देण्यांत आले आहे.''जेव्हा आम्हास पाणी मिळणार नाही, तर जमिनीच्या मातीला आमच्यासाठी पाकसाफ होण्याचे साधन बनवून देण्यात आले आहे.'' (स.मुस्लीम किताबुल मसाजिद)

६) यहूद्यांच्या बेईमानी आणि खोडसाळपणात एक हे सुद्धा होते की, ''आम्ही ऐकले'' च्या बरोबर हे पण सांगून देत की,''परंतु आम्ही आज्ञाभंग करू म्हणजे आज्ञापालन करणार नाही.'' हे मनांत म्हणत किंवा आपल्या साथीदारांना सांगत; किंवा उद्धटपणे धिटाईचे प्रदर्शन करीत, तोंडावर सांगत. त्याचप्रमाणे 'गैर मुसमअिन्' (तुझी गोष्ट ऐकली न जाओ) हे बददुआ प्रमाणे म्हणत; म्हणजे तुझी गोष्ट कबूल न केली जाओ. 'राअिना'च्या बाबतीत पहिले येऊन चुकले आहे.(सू. बक़राचा महावाक्य क्रं. १०४ चे भाष्य)

७) म्हणजे ईमान आणणारे फारच अल्प आहेत, जसे की, पहिले येऊन चुकले आहे की, यहूद्यांमधून ईमान आणणाऱ्यांची संख्या दहापर्यंत देखील पोहचली नाही; किंवा हा अर्थ आहे की, फारच कमी गोष्टींवर ईमान आणतात. जेव्हा की फायदा पोहचवणारे ईमान हे आहे की, सर्व गोष्टींवर ईमान आणले जावे.

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اُوۡتُوا الۡكِتٰبَ اٰمِنُوۡا بِمَا نَزَّلۡنَا مُصَدِّقًا لِّمَا مَعَكُمۡ مِّنۡ قَبۡلِ اَنۡ نَّطۡمِسَ وُجُوۡهًا فَنَرُدَّهَا عَلٰٓى اَدۡبَارِهَاۤ اَوۡ نَلۡعَنَهُمۡ كَمَا لَعَنَّاۤ اَصۡحٰبَ السَّبۡتِ‌ؕ وَكَانَ اَمۡرُ اللّٰهِ مَفۡعُوۡلًا ﴿۴۷﴾

**अहो ग्रंथधारी लोकांनो! जे काही आम्ही अवतरीत केले आहे, जे यालाही सत्य ठरवतात जे तुमच्या जवळ आहे. याच्यावर ईमान आणा यापूर्वी की आम्ही चेहरे बिघडवून टाकू. आणि त्यांना फिरवून पाठीकडे करून टाकू[१]. किंवा त्यांना शापग्रस्त केले, जसे आम्ही शनिवारच्या दिवसवाल्यांना शापग्रस्त केले[२] आणि अल्लाहचा हुकूम (आदेश) लागू होतच असतो.[३] ४७**

اِنَّ اللّٰهَ لَا يَغۡفِرُ اَنۡ يُّشۡرَكَ بِهٖ وَيَغۡفِرُ مَا دُوۡنَ ذٰ لِكَ لِمَنۡ يَّشَآءُ‌ ۚ وَمَنۡ يُّشۡرِكۡ بِاللّٰهِ فَقَدِ افۡتَـرٰۤى اِثۡمًا عَظِيۡمًا ﴿۴۸﴾

**खचितच् अल्लाहतआला आपल्याबरोबर सरकतदार ठरविण्याला माफ करीत नाही. आणि याच्या शिवाय ज्याला इच्छितो त्याला माफ करून टाकतो[४] आणि जो अल्लाहतआलाबरोबर सरकतदार निश्चित करेल. त्याने फार मोठे पाप आणि खोटा आळ[५] घेतला ४८**

اَلَمۡ تَرَ اِلَى الَّذِيۡنَ يُزَكُّوۡنَ اَنۡفُسَهُمۡ‌ؕ بَلِ اللّٰهُ يُزَكِّىۡ مَنۡ يَّشَآءُ وَلَا يُظۡلَمُوۡنَ فَتِيۡلًا ﴿۴۹﴾

**काय आपण त्यांना बघितले नाही जे (लोक) आपणास स्वत: सोवळे व पवित्र ठरवितात; परंतु अल्लाहतआला ज्याला इच्छितो त्याला पवित्र करतो, कोणावर एका दोऱ्या बरोबर पण जुलूम केला जाणार नाही[६] ४९**

اُنۡظُرۡ كَيۡفَ يَفۡتَرُوۡنَ عَلَى اللّٰهِ الۡكَذِبَ‌ؕ وَكَفٰى بِهٖۤ اِثۡمًا مُّبِيۡنًا ﴿۵۰﴾

**बघा, हे लोक अल्लाहतआलावर कसे खोटे कुभांड रचतात[७] आणि त्यांची कृती खुल्लम खुल्ला पाप होण्यास पुरेशी आहे[८] ५०**

१) म्हणजे जर अल्लाहतआला इच्छिल, तर तुम्हाला तुमच्या कृत्याच्या बदल्यात ही शिक्षा देऊ शकेल.
२) ही गोष्ट सू.आअराफ मध्ये येईल, काही इशारा पहिले पण येऊन गेला; म्हणजे तुम्ही सुद्धा यांच्याप्रमाणे शापग्रस्त ठरू शकतात.
३) म्हणजे तो जेव्हा कुठल्या गोष्टीचा आदेश देईल, तर न कुणी त्याच्या विरूद्ध जाऊ शकतो; न त्याला थांबवू शकतो.
४) म्हणजे असे गुनाह ज्यापासून तौबा करण्यापूर्वीच विश्वासू मरून जाईल, अल्लाहतआला जर कोणासाठी इच्छिल, तर कुठल्याही प्रकारची शिक्षा दिल्या शिवाय, क्षमा करून टाकीन, आणि पुष्कळांना शिक्षेनंतर आणि पुष्कळांना नबी ﷺ च्या शफाअत वर माफ करून टाकेन. परंतु 'शिर्क' कुठल्याही परिस्थितीत क्षमा केली जाणार नाही. कारण की 'मुश्‌रिक' साठी अल्लाहने स्वर्गाला निषीद्ध केले आहे.
५) दुसऱ्या ठिकाणी म्हटले,''शिर्क' मोठाच अन्याय आहे.'' (सू. लुकमान - १३) हदीसमध्ये याला सर्वांत मोठा गुनाह ठरविण्यात आला आहे.
६) यहूदी स्वत:च आपली प्रशंसा करीत असत. उदाहरणार्थ, आम्ही अल्लाहचे पुत्र आणि त्याचे लाडके आहोत, वगैरे अल्लाहने म्हटले, पाकसाफ करून घेण्याचा अधिकार पण अल्लाहला आहे आणि त्याचे ज्ञानपण त्यालाच आहे. 'फतील' खजुरीचे बी कापल्यानंतर जे दोरा किंवा सुईप्रमाणे निघते किंवा दिसते त्याला म्हणतात, म्हणजे एवढा देखील जुलूम केला जाणार नाही.
७) म्हणजे स्वतःला सोवळे व पाकसाफ होण्याचा दावा केल्यानंतर.
८) म्हणजे त्यांचा हा प्रयत्न (आपल्या शुची भुर्ततेचा डांगोरा पिटणे) त्यांच्या खोटेपणासाठी पुरेसा आहे. कुरआन करीमचे हे महावाक्य आणि त्याच्या अवतरीत होण्याच्या कारणांचे उल्लेखाने माहित होते की, एक दुसऱ्याची स्तुती आणि प्रशंसेने विशेषत: अंतःकरणाच्या शुद्धीचा दावा करणे बरोबर आणि योग्य नाही. या गोष्टीला कुरआन करीमच्या दुसऱ्या ठिकाणी, अशाप्रकारे वर्णन केले गेले आहे, ''आपल्या स्वत:ची पवित्रता आणि प्रशंसा करू नका, अल्लाहतआला जाणतो तुमच्यात सदाचरणी कोण आहे?'' (सू. अन्नजम-३२) हदीसमध्ये ह. मिकदाद رضي الله عنه वर्णन करतात की, ''नबी ﷺ नी आम्हास आदेश दिला की, आम्ही स्तुती करणाऱ्यांच्या चेहऱ्यावर माती टाकून द्यावी.'' आणखी एका दुसऱ्या हदीसमध्ये रसूल ﷺ नी एका माणसाला दुसऱ्या माणसाची स्तुती करताना ऐकले; जेव्हा आपण ﷺ नी म्हटले, ''तुझ्यावर खेद आहे की तू आपल्या साथीदारांची मान कापून टाकली.'' मग सांगितले की,''जर तुमच्यातून कोणाला कोणाची स्तुती करावीच लागली तर त्याने याप्रमाणे म्हणावे,''अहसीबुह् कजा'' मी त्याचा अशाप्रकारे विचार करतो; अल्लाहवर कोणाची पवित्रता वर्णन करू नये. (स.बुखारी , स. मुस्लीम)

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْنَ اُوْتُوْا نَصِيْبًا مِّنَ الْكِتٰبِ يُؤْمِنُوْنَ بِالْجِبْتِ وَالطَّاغُوْتِ وَيَقُوْلُوْنَ لِلَّذِيْنَ كَفَرُوْا هٰۤؤُلَاۤءِ اَهْدٰى مِنَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا سَبِيْلًا ﴿٥١﴾

काय आपण त्यांना पाहिले नाही, ज्यांना पुस्तकाचा काही भाग मिळाला आहे, ते मूर्तीवर आणि खोट्या उपास्यावर विश्वास ठेवतात.आणि काफिरांच्या बाबतीत म्हणतात की, हे लोक ईमानवाल्यांपेक्षा जास्त सरळ मार्गावर आहेत[१] (५१)

اُولٰۤئِكَ الَّذِيْنَ لَعَنَهُمُ اللّٰهُ ؕ وَمَنْ يَّلْعَنِ اللّٰهُ فَلَنْ تَجِدَ لَهٗ نَصِيْرًا ﴿٥٢﴾

हेच ते लोक आहेत, ज्यांना अल्लाहतआलाने शापित केले आहे; आणि ज्याला अल्लाहतआला शापग्रस्त करून टाकेल, तू त्याचा कोणी मददगार पावणार नाही (५२)

اَمْ لَهُمْ نَصِيْبٌ مِّنَ الْمُلْكِ فَاِذًا لَّا يُؤْتُوْنَ النَّاسَ نَقِيْرًا ﴿٥٣﴾

काय यांचा काही राज्यांत वाटा आहे. जर असे असेल तर मग हे कोणाला एका खजुरीच्या एका तुकड्याबरोबर देखील देणार नाही[२]. (५३)

اَمْ يَحْسُدُوْنَ النَّاسَ عَلٰى مَاۤ اٰتٰىهُمُ اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖ ۚ فَقَدْ اٰتَيْنَاۤ اٰلَ اِبْرٰهِيْمَ الْكِتٰبَ وَالْحِكْمَةَ وَاٰتَيْنٰهُمْ مُّلْكًا عَظِيْمًا ﴿٥٤﴾

किंवा ते लोकांवर ईर्ष्या करतात, यावर की, अल्लाहतआलाने आपल्या कृपेने त्यांना ठेवले आहे[३]; बस आम्ही इब्राहीमच्या संततीला पुस्तक आणि ज्ञान सुद्धा दिली आहेत. आणि मोठे राज्य पण दिले आहे (५४)

فَمِنْهُمْ مَّنْ اٰمَنَ بِهٖ وَمِنْهُمْ مَّنْ صَدَّ عَنْهُ ؕ وَكَفٰى بِجَهَنَّمَ سَعِيْرًا ﴿٥٥﴾

मग यांच्यातून कित्येकांनी या पुस्तकाला मान्यता दिली आणि काही यापासून थांबून राहिले[४]; आणि नरकाग्नीचे (त्यांना) जाळणे पुरेसे आहे (५५)

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا بِاٰيٰتِنَا سَوْفَ نُصْلِيْهِمْ نَارًا ؕ كُلَّمَا نَضِجَتْ جُلُوْدُهُمْ بَدَّلْنٰهُمْ جُلُوْدًا غَيْرَهَا لِيَذُوْقُوا الْعَذَابَ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَزِيْزًا حَكِيْمًا ﴿٥٦﴾

ज्या लोकांनी आमच्या महावाक्यांना नाकारले, त्यांना आम्ही खचितच् नरकाग्नीत झोकून देऊ[५]; जेव्हा त्यांच्या कातड्या जळून जातील, आम्ही त्यांच्या आणखी कातड्या बदलवून टाकू, कारण की, त्यांनी शिक्षेची (मजा) चाखत रहावी[६]; नि:संशय अल्लाहतआला सर्व समर्थ व ज्ञानी आहे (५६)

१) या महावाक्यात, यहूद्यांच्या आणखी एका कृत्याबद्दल आश्चर्य व्यक्त केले जात आहे; की ग्रंथधारी असूनसुद्धा हे 'जिब्त' (मूर्ती, ज्योतिषी किंवा जादूगिरी) आणि 'तागूत' (म्हणजे खोटे उपास्य) वर विश्वास ठेवतात; आणि मक्केच्या काफिरांना मुसलमानांपेक्षा जास्त सरळ मार्गावर समजतात. 'जिब्त' चे हे सर्व उल्लेखित अर्थ केले गेले आहेत. एका हदीसीत आले आहे, ''पक्षी उडवून, लाईनी ओढून शगुन अपशगुन घेणे हे 'जिब्त' मधून आहे.'' (सुनन अबी दाऊद) म्हणजे ही सर्व शैतानी कामे होत आणि यहूद्यांमध्ये सुद्धा या गोष्टी सर्रास आढळून येत. 'तागूत' चा एक अर्थ 'शैतान' सुद्धा केला गेला आहे. वास्तविक खोट्या उपास्यांची उपासना, शैतानाचेच अनुकरण आहे. म्हणून शैतानसुद्धा खचितच् 'तागूत' मध्ये सामील आहे.

२) हे चौकशी करणे नकारात्मक आहे. म्हणजे राज्यसत्तेत यांचा कुठलाही वाटा नाही. जर यात कसलाही वाटा असता, तर हे यहूदी इतके कंजुष आहेत की, लोकांना विशेषत: मोहम्मद ﷺ ना, इतकेपण दिले नसते की, ज्याच्याने खजुरीच्या बी वरील बारीक बिंदू सुद्धा भरला नसता. 'नकीर' त्या बिंदुला म्हणतात, जो खजुरीच्या बी च्यावर असतो. (इब्ने कसीर)

३) म्हणजे परंतु, हे या गोष्टीवर इर्ष्या करतात की, अल्लाहतआलाने बनी इसराईल सोडून, दुसऱ्यांमध्ये पैगंबर (म्हणजे शेवटच्या पैगंबर) का पाठवला? पैगंबरी अल्लाहची सर्वांत मोठी कृपा आहे.

४) म्हणजे बनु इसराईलला, जी ह.इब्राहीम عليه السلام ची संतती आणि औलाद आहे. आम्ही पैगंबरीपण दिली आणि राजसत्ता आणि राज्यपण दिले तरी सुद्धा यहूद्यांच्या या सर्व लोकांनी त्यांच्यावर ईमान आणले नाही. काहींनी ईमान आणले व काहींनी विरोध केला. अर्थ हा आहे की, हे मोहम्मद ﷺ! जर हे आपल्या पैगंबरीवर ईमान आणित नाहीत; तर काही विचित्र गोष्ट नाही; यांचा तर इतिहासच, पैगंबराच्या नाकारण्याने भरलेला आहे; येथपावेतो, त्यांच्या वंशाच्या पैगंबरांवर सुद्धा ईमान आणले नाही. म्हणजे या यहूद्यांतून काहींनी नबी ﷺ वर ईमान आणले आणि काहींनी नकार दिला. या पैगंबरीला नाकारणाऱ्यांचा परिणाम नरकाग्नी (जहन्नम) आहे.

५) म्हणजे नरकाग्नीमध्ये ग्रंथधारी लोकांचे नाकारणारेच जाणार नाहीत तर, इतर सर्व काफिरांचे ठिकाणपण नरकाग्नीच आहे.

६) हे नरकाग्नीच्या शिक्षेची कठोरता,सातत्य व चिरकालीन रहाण्याचे वर्णन आहे. सहाबा कराम رضي الله عنهم च्या म्हणण्यानुसार, दाखविण्यात आले आहे की, कातड्यांचा हा बदल दिवसांतून वीसदा किंबहुना शेकडो वेळा अंमलात येईल.

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ سَنُدْخِلُهُمْ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ؕ لَهُمْ فِيْهَآ اَزْوَاجٌ مُّطَهَّرَةٌ ۫ وَّنُدْخِلُهُمْ ظِلًّا ظَلِيْلًا ۝٥٧

**आणि ज्या लोकांनी ईमान आणले, आणि सदाचरण अंगिकारले[१] आम्ही लवकरच त्यांना स्वर्गाच्या त्या बागांत घेऊन जाऊ. ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात आहेत; ज्यांत ते नेहमी नेहमी राहतील, त्यांच्यासाठी तेथे निर्मळ पत्न्या असतील. आणि आम्ही त्यांना घनदाट छायेत, आणि पूर्ण सुखासमाधानांत घेऊन जाऊ[२] ५७**

اِنَّ اللّٰهَ يَاْمُرُكُمْ اَنْ تُؤَدُّوا الْاَمٰنٰتِ اِلٰٓى اَهْلِهَا ۙ وَاِذَا حَكَمْتُمْ بَيْنَ النَّاسِ اَنْ تَحْكُمُوْا بِالْعَدْلِ ؕ اِنَّ اللّٰهَ نِعِمَّا يَعِظُكُمْ بِهٖ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ سَمِيْعًاۢ بَصِيْرًا ۝٥٨

**अल्लाहतआला तुम्हास ताकीदीने आदेश देत आहे की, ठेवीदारांना त्यांच्या ठेवी परत करा[३]; आणि जेव्हा लोकांत निर्णय कराल, तेव्हा न्यायपूर्ण निर्णय करा[४]. खचितच् ही फार चांगली गोष्ट आहे; ज्याचा उपदेश अल्लाहतआला तुम्हास करीत आहे[५]. नि:संशय अल्लाहतआला, ऐकतो आणि पाहतो आहे ५८**

१) काफिरांच्या तुलनेत ईमानवाल्यासाठी ज्या चिरकालीन देणग्या आहेत. त्यांचे वर्णन करण्यात येत आहे. परंतु ते ईमानवाले जे सदाचरणाच्या दौलतीने संपन्न असतील. जअलनल्लाहू मिनहुम्! अल्लाहतआलाने कुरआन मजीदमध्ये प्रत्येक ठिकाणी ईमानाबरोबर सदाचरणाचा उल्लेख करून, स्पष्ट करून दिले की, त्यांचा आपसांत फारच घनिष्ठ संबंध आहे. ईमान, सदाचरणाशिवाय असेच आहे, जसे फूल असावे परंतु सुवासाशिवाय, वृक्ष असावा परंतु फळांशिवाय. सहाबा कराम ﵃ आणि उत्कृष्ट काळांतील (खैरूल कुरून) दुसऱ्या मुसलमानांनी या मुद्याला समजून घेतले होते. म्हणून त्यांचे जीवन ईमानाची फळे, सदाचरणाने संपन्न होती. त्या काळांत निष्कर्मता किंवा दुष्कर्मताबरोबर ईमानची कल्पनाच नव्हती. याच्या उलट आज ईमान फक्त तोंडी जमाखर्चाचे नांव राहून गेले आहे. ईमानदार होण्याचा दावा करणारे, सदाचरणाने रिकामे आहेत. हदानल्लाहुतआला ! अशाचप्रकारे जर कोणी मनुष्य, असे कर्म करितो, जे सदाचरणांत मोडतात. उदाहरणार्थ, सत्यकथन, प्रामाणिकपणा, सहानुभूती व दुसऱ्यांच्या दु:खात सहभागी होणे, आणि इतर चारित्र्य विषयक चांगुलपणा पण ईमानच्या दौलतीपासून ते वंचित आहेत, तर त्याची ही कर्मे या जगात तर त्याची प्रसिद्धी व चांगले नांव कमविण्याला कारणीभूत होऊ शकतात; परंतु अल्लाहच्या दरबारी यांची काहीच कदर आणि किंमत होणार नाही. यासाठी की, त्यांच्या सदाचरणाचे मूळ ईमान नाही; जे चांगली कृत्ये अल्लाहसाठीच करण्यास उद्युक्त करते. परंतु फक्त आणि फक्त ऐहीक फायदे किंवा सामाजिक चारित्र्य आणि सवयी त्यांचे मूळ आहे.

२) घनदाट, गर्द, चांगली व पवित्र सावली ज्याला भाषांतरात 'पूर्ण सुखासमाधानाने' अंकीत केले आहे. एका हदीसमध्ये आहे, ''स्वर्गात एक वृक्ष आहे, ज्याची सावली इतकी आहे की, त्याला एक घोडे स्वार शंभर वर्षातसुद्धा पार करू शकणार नाही. हा वृक्ष 'शजरतुल खुल्द' आहे. (स. बुखारी, मुसनद अहमद)

३) बहुतेक भाष्यकारांजवळ, हे महावाक्य, ह.उसमान बिन तलहा ﵁ च्या प्रतिष्ठेत, जे वंशपरंपरेने खाना ए काबाचे दरबान आणि ज्यांच्याजवळ काबाची चावी होती म्हणून चालत आले होते; अवतरीत झाले आहे. मक्केवर विजय मिळविल्यानंतर जेव्हा रसूल ﷺ जेव्हा खाना ए काबामध्ये आगमनकर्ते झाले. तेव्हा प्रदक्षिणे वगैरे नंतर; त्यांनी ह.उसमान बिन तलहा ﵁ ला जे हुदैबियाच्या तहाच्या वेळी मुसलमान होऊन चुकले होते; बोलाविले आणि त्यांना खान ए काब्याच्या किल्ल्या देऊन म्हटले, ''या तुमच्या किल्ल्या आहेत; आजचा दिवस प्रामाणिकपणा आणि पुण्याचा दिवस आहे.'' (इब्ने कसीर) महावाक्याचे अवतरणाचे हे कारण जरी खास असले तरी याचा आदेश सार्वत्रिक आहे. आणि याचे अनुलक्षित जनता आणि अधिकारी दोन्ही आहेत. दोहोंना ताकीद करण्यात येत आहे की, ठेवी त्यांना पोहचवा जे ठेवी बाळगण्यात पात्र आहेत. यात एक तर त्या ठेवी सामील आहेत, ज्या कोणा ना कोणाजवळ ठेवलेली असतील. त्यांच्यात लबाडी न केली जावी; परंतु त्या सुरक्षितपणे जेव्हा मागणी केली जाईल, तेव्हा परत केल्या जाव्यांत. दुसरे अधिकार आणि मनसबाची पदे लायक व्यक्तींना दिले जावेत; केवळ राजकीय मूळ किंवा वांशिक किंवा रहिवास या आधारावर किंवा नातेवाईक किंवा घराण्याच्या आधारावर किंवा कोटा पद्धतच्या आधारावर अधिकार आणि पदे देणे, या महावाक्याच्या विरूद्ध आहे.

४) यात अधिकाऱ्यांना विशेष करून न्याय योग्य करण्याचा हुकूम देण्यात आला आहे. एका हदीसमध्ये आहे,''अधिकारी जोपर्यंत अन्याय करणार नाही, अल्लाह त्याचे बरोबर असतो. जेव्हा तो अन्याय करणे सुरू करतो तर अल्लाह त्याला त्याच्या मनोकामनेच्या हवाली करून टाकतो. (सुनन् इब्ने माजा.)

५) म्हणजे ठेवी योग्य माणसांच्या हवाली करणे आणि न्यायनिवाडा योग्य करणे.

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اَطِيْعُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوا الرَّسُوْلَ وَاُولِی الْاَمْرِ مِنْكُمْ ۚ فَاِنْ تَنَازَعْتُمْ فِیْ شَیْءٍ فَرُدُّوْهُ اِلَی اللّٰهِ وَالرَّسُوْلِ اِنْ كُنْتُمْ تُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ ؕ ذٰلِكَ خَيْرٌ وَّاَحْسَنُ تَاْوِيْلًا ﴿۵۹﴾

**हे ईमानवाल्यांनो! आज्ञापालन करा अल्लाहचे आणि आज्ञापालन करा रसूल (सल्ल.) चे आणि तुमच्च्यांत जे अधिकारी आहेत त्यांचे[१]; मग जर कोण्या गोष्टीत मतभेद होईल; तर त्याला घेऊन चला अल्लाहतआलाकडे आणि त्याचा रसूलकडे, जर तुमचा अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर विश्यास आहे. हे फार उत्तम आहे आणि परिणामाच्या दृष्टीने फार चांगले आहे[२] ५९**

اَلَمْ تَرَ اِلَی الَّذِيْنَ يَزْعُمُوْنَ اَنَّهُمْ اٰمَنُوْا بِمَاۤ اُنْزِلَ اِلَيْكَ وَمَاۤ اُنْزِلَ مِنْ قَبْلِكَ يُرِيْدُوْنَ اَنْ يَّتَحَاكَمُوْۤا اِلَی الطَّاغُوْتِ وَقَدْ اُمِرُوْۤا اَنْ يَّكْفُرُوْا بِهٖ ؕ وَيُرِيْدُ الشَّيْطٰنُ اَنْ يُّضِلَّهُمْ ضَلٰلًا بَعِيْدًا ﴿۶۰﴾

**काय तुम्ही त्यांना पाहिले नाही ? ज्यांचा दावा तर हा आहे की, जे काही तुम्हांवर आणि जे काही तुमच्यापूर्वी उतारण्यात आले आहे त्यावर त्यांचे ईमान आहे; परंतु ते आपले न्यायनिवाडे अल्लाहशिवाय इतरांकडे नेऊ इच्छितात; वास्तविक त्यांना आदेश देण्यांत आला आहे की, शैतानाला (त्यांनी) नाकारावे; शैतान तर हे इच्छितो की, त्यांना बहकवून दूर करून टाकावे ६०**

१) 'उलुल अम्र' (आपल्यातून अधिकार बाळगणारे) ने अभिप्रेत काहींजवळ, पदाधिकारी व अधिकारी काही जवळ धर्मपंडित व धर्मशास्त्री (उलमांजवळ फुकहा) आहेत. विषयाच्या दृष्टीकोनातून दोन्हीपण अभिप्रेत होऊ शकतात. अर्थ असा की खरे आज्ञापालन तर अल्लाहतआलाचेच आहे. कारण की, ''सावधान! निर्मितीपण त्याचीच आहे; आदेशपण त्याचाच आहे.'' (सू. आअराफ-५४) 'आदेश फक्त अल्लाहतआलाचाच आहे.' (सू. यूसुफ-४०) परंतु, जेव्हा, पैगंबर फक्त अल्लाहतआलाच्या इच्छेचेच प्रदर्शन आहे; आणि त्याच्या मर्जीचा प्रतिनिधी आहे. म्हणून अल्लाहतआलाने आपल्याबरोबर पैगंबराच्या आदेशाला सुद्धा कायमस्वरूपी आज्ञापालन करणे आवश्यक ठरविले की, पैगंबरांचे आज्ञापालन मुळांत अल्लाहतआलाचेच आज्ञापालन आहे. ''ज्याने रसूल ﷺ चे आज्ञापालन केले, त्याने अल्लाहतआलाचे आज्ञापालन केले.'' (सू. निसा-८०) ज्यामुळे ही गोष्ट स्पष्ट होते की, हदीसपण कुरआन प्रमाणे इस्लामचा भाग आहे. तथापि अधिकारी आणि पदाधिकाऱ्यांचे आज्ञापालनपण आवश्यक आहे. कारण ते अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या ﷺ आदेशाला जारी करतात; किंवा उम्मतच्या एकत्रित सुधारणा करण्याची व्यवस्था आणि देखरेख करतात. याने ठाऊक झाले की, जरी अधिकारी आणि पदाधिकारीचे आज्ञापालन आवश्यक असले, तरी ते एकदम मुक्त नाही; परंतु सशर्त आहे, अल्लाह आणि रसूलच्या आज्ञापालनाबरोबर. याचसाठी 'अतिउल्लाह्' च्या नंतर 'अतिउर्रसूल' तर म्हटले; कारण की हे दोन्ही आज्ञापालन कायमस्वरूपी आणि आवश्यक आहेत; परंतु 'अधिकाऱ्यांचे आज्ञापालन करा' असे म्हटले नाही. कारण की, अधिकाऱ्यांचे आज्ञापालन कायमस्वरूपी नाही. आणि हदीसमध्ये पण सांगण्यात आले आहे की, ''गुन्ह्याच्या कामात आज्ञापालन यासाठी नाही, आज्ञापालन फक्त पुण्याच्या कामात आहे.'' (स.बुखारी, स.मुस्लीम) हीच स्थिती धर्मपंडित आणि धर्मशास्त्रींची पण आहे. (जर उलुल अम्रमध्ये यांनापण सामील केले गेले तर) म्हणजे यांचे आज्ञापालन करण्यात येईल की, ते अल्लाह आणि त्याच्या रसूल ﷺ चे आदेश आणि आज्ञा वर्णन करतात, आणि त्याच्या धर्माकडे उपदेश व मार्गदर्शन करतात. परंतु त्याचे आज्ञापालन देखील त्यावेळेपर्यंत केले जाईल, जोपर्यंत जनतेला फक्त अल्लाह आणि त्याच्या रसूलची गोष्ट सांगितली जाईल, परंतु जर ते यापासून परांडमुख होतील, तर जनतेला त्याचे आज्ञापालन करणे पण आवश्यक नाही. उलट त्यांच्या परांडमुख होण्याच्या स्वरुपांत, जाणून बुजून त्यांचे आज्ञापालन करणे, मोठे पाप आणि फारच गुनाह आहे.

२) 'अल्लाहकडे वळा' ने अभिप्रेत कुरआन करीम आणि अर्ररसूल ने अभिप्रेत रसूल ﷺ ची हदीस आहे. हे मतभेदांना संपविण्यासाठी उत्कृष्ठ तत्त्व दाखवून देण्यात आले आहे. या तत्त्वाने सुद्धा स्पष्ट होते की, कोण्या तिसऱ्या व्यक्तीचे आज्ञापालन आवश्यक नाही. ज्याप्रमाणे की, कुण्या व्यक्तीचे अनुकरण किंवा कुणी निश्चिती केल्याचे अनुकरण मानणाऱ्यांनी एका तिसऱ्या आज्ञापालनलापण आवश्यक ठरवून ठेवले आहे. आणि याच तिसऱ्या आज्ञापालनाने जे कुरआनाच्या या महावाक्याच्या अगदी स्पष्ट विरोधांत आहे; मुसलमानांच्या 'एक उम्मत' च्या ऐवजी 'विभक्त उम्मत' बनवून ठेवले आहे; आणि त्यांच्या एकीला जवळ जवळ अशक्य करून टाकले आहे.

وَاِذَا قِيۡلَ لَهُمۡ تَعَالَوۡا اِلٰى مَاۤ اَنۡزَلَ اللّٰهُ وَاِلَى الرَّسُوۡلِ رَاَيۡتَ الۡمُنٰفِقِيۡنَ يَصُدُّوۡنَ عَنۡكَ صُدُوۡدًا ۚ﴿۶۱﴾

**आणि त्यांना जेव्हा कधी सांगण्यात येते की, अल्लाहने अवतरित केलेल्या वाणीकडे आणि रसूल (सल्ल.) कडे या, तर आपण पाहून घ्याल की,हे दांभिक (मुनाफीक) आपल्याकडून तोंड फिरवून, थांबून जातात[१] ६१**

فَكَيۡفَ اِذَاۤ اَصَابَتۡهُمۡ مُّصِيۡبَةٌ ۢ بِمَا قَدَّمَتۡ اَيۡدِيۡهِمۡ ثُمَّ جَآءُوۡكَ يَحۡلِفُوۡنَ ۖ بِاللّٰهِ اِنۡ اَرَدۡنَاۤ اِلَّاۤ اِحۡسَانًا وَّتَوۡفِيۡقًا ﴿۶۲﴾

**मग काय गोष्ट आहे की, जेव्हा त्यांच्यावर त्यांच्या कृत्यामुळे कोणी संकट येऊन पडते; तर हे आपल्याजवळ येऊन अल्लाहच्या शपथा वाहतात की, आमचा इरादा तर फक्त भलाई आणि समेटाचाच होता[२] ६२**

اُولٰٓـئِكَ الَّذِيۡنَ يَعۡلَمُ اللّٰهُ مَا فِىۡ قُلُوۡبِهِمۡ فَاَعۡرِضۡ عَنۡهُمۡ وَعِظۡهُمۡ وَقُلْ لَّهُمۡ فِىۡۤ اَنۡفُسِهِمۡ قَوۡلًاۢ بَلِيۡغًا ﴿۶۳﴾

**हे ते लोक आहेत की, ज्यांच्या मनातील भेद, अल्लाहतआला चांगल्याप्रकारे जाणतो. आपण त्यांच्याकडे डोळे झांक करा, त्यांना उपदेश करत रहा,आणि त्यांना अशी गोष्ट सांगा जी त्यांच्या मनांत घर करून राहील[३] ६३**

وَمَاۤ اَرۡسَلۡنَا مِنۡ رَّسُوۡلٍ اِلَّا لِيُطَاعَ بِاِذۡنِ اللّٰهِ ؕ وَلَوۡ اَنَّهُمۡ اِذْ ظَّلَمُوۡۤا اَنۡفُسَهُمۡ جَآءُوۡكَ فَاسۡتَغۡفَرُوا اللّٰهَ وَاسۡتَغۡفَرَ لَهُمُ الرَّسُوۡلُ لَوَجَدُوا اللّٰهَ تَوَّابًا رَّحِيۡمًا ﴿۶۴﴾

**आम्ही प्रत्येक पैगंबराला केवळ यासाठी पाठविले की, अल्लाहतआलाच्या आदेशाने त्याचे आज्ञापालन केले जावे; आणि जर हे लोक जेव्हा त्यांनी आपल्या जीवावर जुलूम केला होता, आपल्याजवळ आले असते, आणि अल्लाहतआलाजवळ क्षमा याचना करते आणि पैगंबरपण क्षमायाचना करता[४]; तर खचितच् हे लोक अल्लाहतआलाला क्षमाकर्ता आणि दयाळू पावते ६४**

१) हे महावाक्य अशा लोकांच्या बाबतीत अवतरित झाले आहे, जे आपला न्याय निवाडा मोहम्मद ﷺ च्या न्यायालयात नेण्याऐवजी, यहूद्यांच्या सरदारांकडे किंवा कुरैशच्या सरदारांकडे नेऊ इच्छित होते. तथापि याचा आदेश सार्वत्रिक आहे. आणि यांच्यात ते सर्व लोक शामील आहेत, जे कुरआन व हदीसवर आक्षेप ठेवून, आपल्या न्यायनिवाड्यासाठी या दोहोंना सोडून कोण्या दुसरीकडेच जातात. नाही तर मुसलमानांची स्थिती तर ही असते, ''की जेव्हा त्यांना अल्लाह आणि रसूलकडे बोलाविले जाते, की ते त्यांच्यात निर्णय करतील तर हे म्हणतात समेअना व अतअना (आम्ही ऐकले व मान्य केले)'' (सू. नूर-५१) अशाच लोकांच्या बाबतीत, पुढे अल्लाहतआलाने म्हटले, ''हेच लोक सफल आहेत''

२) म्हणजे जेव्हा आपल्या कर्मामुळे, अल्लाहच्या शिक्षेचे शिकार होऊन, संकटात सापडतात, तेव्हा येऊन सांगतात की, कोण्या दुसऱ्या जागी जाण्याचा उद्देश नव्हता की, जेथून आम्ही निर्णय करून घ्यावा किंवा आपल्या ﷺ पेक्षा जास्त तेथे आम्हास न्याय मिळाला असता, परंतु उद्देश (फक्त) तडजोड आणि समेट करणे होते.

३) अल्लाहतआलाने म्हटले, जरी आम्ही त्यांच्या मनातील सर्व भेदाशी अवगत आहोत, (ज्यावर आम्ही त्यांना बदला देऊ) परंतु हे पैगंबरा! आपण त्यांच्या जाहीर गोष्टींना समोर ठेवून त्यांना नजरअंदाज करावे. आणि हितोपदेश, आणि त्यांच्या मनाची पकड घेणाऱ्या कथनाने, त्यांच्यात सुधारणा करण्याचा प्रयत्न चालू ठेवावा. ज्यामुळे हे ठाऊक झाले की, शत्रुच्या कारस्थानांना, क्षमा आणि दुर्लक्ष करून हितोपदेश व मनाची पकड घेणाऱ्या वक्तव्याने काम करण्याचा प्रयत्न केला गेला पाहिजे.

४) क्षमायाचनेसाठी अल्लाहच्या दरबारांतच पश्चात्ताप आणि माफी मागणे आवश्यक आणि पुरेसे आहे. परंतु येथे त्यांना सांगण्यांत आले आहे की, हे पैगंबरा! ते आपणाजवळ येते आणि अल्लाहजवळ क्षमायाचना करते, आणि आपण सुद्धा त्यांच्यासाठी क्षमायाचना करता. हे यासाठी की त्यांनी, आपसातील विवादांसाठी दुसऱ्यांकडे धाव घेवून आपणास कमी लेखले होते, यासाठी त्याच्या निरसनाकरीता आपल्याजवळ येण्याची ताकीद केली. उघड गोष्ट आहे की, पार्श्वभूमीच्या दृष्टीने सुद्धा आणि शब्दांच्या दृष्टीकोनातून सुद्धा, या मार्गदर्शनाचा संबंध फक्त आपल्या ﷺ जीवनाशी होता. परंतु काही लोक म्हणतात, आजसुद्धा नबी ﷺ च्या कबरीवर क्षमायाचनेसाठी हजर होणे असेच आहे, जसे आपल्या ﷺ जीवनांत होते. 'इन्ना लिल्लाहे, व इन्ना इलहै राजीऊन.''

فَلَا وَرَبِّكَ لَا يُؤْمِنُونَ حَتَّىٰ يُحَكِّمُوكَ فِيمَا شَجَرَ بَيْنَهُمْ ثُمَّ لَا يَجِدُوا فِي أَنفُسِهِمْ حَرَجًا مِّمَّا قَضَيْتَ وَيُسَلِّمُوا تَسْلِيمًا ﴿٦٥﴾

**तर शपथ आहे तुझ्या पालनकर्त्याची हे मोमिन होऊ शकत नाही, जोपर्यंत आपसातील सर्व मतभेदांत आपणास ते न्यायधीश मानून न घेतील; मग जो निर्णय आपण त्यांच्यात करून टाकाल, त्यामुळे आपल्या मनांत कुठल्याही प्रकारची कमी आणि नाखुषी आढळणार नाही आणि आज्ञापालनाबरोबर त्याला कबूल करून घेतील[१] ६५**

وَلَوْ أَنَّا كَتَبْنَا عَلَيْهِمْ أَنِ اقْتُلُوا أَنفُسَكُمْ أَوِ اخْرُجُوا مِن دِيَارِكُم مَّا فَعَلُوهُ إِلَّا قَلِيلٌ مِّنْهُمْ ۖ وَلَوْ أَنَّهُمْ فَعَلُوا مَا يُوعَظُونَ بِهِ لَكَانَ خَيْرًا لَّهُمْ وَأَشَدَّ تَثْبِيتًا ﴿٦٦﴾

**आणि जर आम्ही त्यांच्यावर हे अनिवार्य करून टाकले असते की, आपणच आपल्याला ठार करून टाका किंवा आपल्या घरादारातून निघून जा, तर यांच्यातून फारच थोड्या लोकांनी त्यांवर अंमलबजावणी केली असती; आणि जर ते तेच करतील, ज्याचा त्यांना उपदेश करण्यात येत आहे, तर खचितच् हे त्यांच्यासाठी चांगले असेल.आणि जास्त मजबूत असेल[२] ६६**

وَإِذًا لَّآتَيْنَاهُم مِّن لَّدُنَّا أَجْرًا عَظِيمًا ﴿٦٧﴾

**आणि तेव्हा आम्ही त्यांना आपल्याकडून मोठे प्रतिफळ देऊ ६७**

وَلَهَدَيْنَاهُمْ صِرَاطًا مُّسْتَقِيمًا ﴿٦٨﴾

**आणि खचितच् त्यांना सरळ मार्ग दाखवून देऊ ६८**

१) या महावाक्याच्या अवतरण्याच्या कारणात एका यहूदी आणि मुसलमानाची गोष्ट सर्व साधारण सांगण्यात येते, जी, हुजूर ﷺ कडून निर्णय झाल्यावर सुद्धा ह.उमर رضي الله عنه कडून निर्णय करून घेण्यासाठी गेला. ज्यावर ह.उमर رضي الله عنه नी त्या मुसलमानाचा शिरच्छेद करून टाकला. परंतु सनदेच्या दृष्टीने ही घटना खरी नाही; जसे की हाफीज इब्ने कसीरने पण स्पष्टीकरण केले आहे. खरी घटना अशी आहे, जी या महावाक्याच्या अवतरणाचे कारण आहे की, ह.जुबैर رضي الله عنه जे रसूल ﷺ चे आतेभाऊ होते, आणि एका माणसाच्या शेताला पाणी देणाऱ्या ओढ्याच्या पाण्यावरून झगडा होऊन गेला. प्रकरण नबी ﷺ पर्यंत पोहचले. आपण ﷺ नी वस्तूस्थिती पाहून जो निर्णय दिला, तो योगायोगाने ह.जुबैर رضي الله عنه च्या पक्षांत होता. ज्यावर दुसऱ्या माणसाने म्हटले की, आपण हा निर्णय यासाठी दिला की, तो आपला आतेभाऊ आहे. यावर हे महावाक्य अवतरीत झाले (स.बुखारी तफसीर सू.निसा) महावाक्याचा अर्थ हा झाला की, नबी ﷺ च्या कुण्या गोष्टी किंवा निर्णयावर मतभेद तर सोडा मनांत संकोचाची जाणीव होणे सुध्दा ईमानाच्या विरूद्ध आहे. हे महावाक्य सुद्धा हदीसीला नाकारण्याकरीता तर आहेच. तकलीद करणाऱ्यासुद्धा विचार करण्यासारखी गोष्ट आहे, जे इमामच्या कौल (कथन) च्या मुकाबल्यात सहीह हदीस ला संकोचाची जाणीवच ठेवत नाही, उलट स्पष्ट शब्दांत, त्याला मानण्याला नकार देतात. (कृपया पहावे, तफसीर तिरमिझी) (मौलाना महमुद हसन देवबंदी यांची) किंवा त्याला बेकार ठरवून किंवा मजबूत रावींना कमजोर ठरवून त्याला कंडम करायचा भरपूर प्रयत्न करतात. ज्याचे एक नाही दहा नाहीत, तर वीसपेक्षा जास्त उदाहरणे दिली जाऊं शकतात.

२) महावाक्यात, याच आज्ञाभंजक प्रकारच्या लोकांच्या नैसर्गिक वर्तणूकीकडे इशारा करून सांगण्यात येत आहे की, जर त्यांना हुकूम देण्यांत आला असता, की, एक दुसऱ्याला ठार करा, किंवा आपल्या घरातून निघून जा, तर हे जेव्हा सोप्या सोप्या गोष्टींवर अंमलबजावणी करू शकले नाहीत, तर यावर कशाप्रकारे अंमलबजावणी केली असती? हे अल्लाहतआलाने आपल्या ज्ञानाप्रमाणे यांच्याबाबतीत म्हटले आहे; जे खरोखर घडलेल्या घटनेप्रमाणे आहे. अर्थ हा आहे की, कठीण आदेशांवर अंमलबजावणी तर खचितच् मुश्कील आहे, परंतु अल्लाहतआला फारच कनवाळू आणि दयाळू आहे; म्हणून त्याचे आदेशपण सोपे आहेत. यासाठी जर ते त्या आदेशावर चालतील, ज्यांचा त्यांना उपदेश केला जात आहे; तर हे त्यांच्यासाठी चांगले आणि दृढनिश्चयाला कारणीभूत होईल; कारण की, ईमान आज्ञापालनाने जास्त आणि गुन्ह्यांनी कमी होत असते. पुण्याने पुण्याचा मार्ग उघडतो आणि पापाने पापालाच जन्म मिळतो, म्हणजे त्याचा मार्ग मोकळा आणि सोपा होतो.

وَمَنْ يُّطِعِ اللّٰهَ وَالرَّسُوْلَ فَاُولٰٓئِكَ مَعَ الَّذِيْنَ اَنْعَمَ اللّٰهُ عَلَيْهِمْ مِّنَ النَّبِيّٖنَ وَالصِّدِّيْقِيْنَ وَالشُّهَدَآءِ وَالصّٰلِحِيْنَ ۚ وَحَسُنَ اُولٰٓئِكَ رَفِيْقًا ﴿٦٩﴾

**आणि जो कोणी अल्लाहचे आणि रसूल (सल्ल.) चे आज्ञापालन करील, आणि त्या लोकांबरोबर राहील, ज्यांच्यावर अल्लाहतआलाने कृपा केली आहे, जसे पैगंबर आणि सत्यवादी आणि हुतात्मे आणि सदाचरणी लोक, हे चांगले मित्र आहेत[१] ६९**

ذٰلِكَ الْفَضْلُ مِنَ اللّٰهِ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ عَلِيْمًا ﴿٧٠﴾

**ही अल्लाहतआलाकडून कृपा आहे आणि अल्लाहतआला जाणणारा पुरेसा आहे ७०**

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا خُذُوْا حِذْرَكُمْ فَانْفِرُوْا ثُبَاتٍ اَوِ انْفِرُوْا جَمِيْعًا ﴿٧١﴾

**हे मुसलमानांनो! आपल्या बचावाचे साधन (सोबत) घेऊन घ्या[२]; मग समूह समूह होऊन कूच करा, किंवा सर्वच्या सर्व एकत्र होऊन निघा ७१**

وَاِنَّ مِنْكُمْ لَمَنْ لَّيُبَطِّئَنَّ ۚ فَاِنْ اَصَابَتْكُمْ مُّصِيْبَةٌ قَالَ قَدْ اَنْعَمَ اللّٰهُ عَلَيَّ اِذْ لَمْ اَكُنْ مَّعَهُمْ شَهِيْدًا ﴿٧٢﴾

**आणि खचितच् तुमच्यात काही असे पण आहेत, जे मागे पुढे करतात[३]. मग जर तुम्हांस काही नुकसान पोहचते, तर मग ते म्हणतात, अल्लाहतआलाने माझ्यावर मोठीच कृपा केली की, मी त्यांच्याबरोबर उपस्थित नव्हतो ७२**

وَلَئِنْ اَصَابَكُمْ فَضْلٌ مِّنَ اللّٰهِ لَيَقُوْلَنَّ كَاَنْ لَّمْ تَكُنْ بَيْنَكُمْ وَبَيْنَهٗ مَوَدَّةٌ يّٰلَيْتَنِيْ كُنْتُ مَعَهُمْ فَاَفُوْزَ فَوْزًا عَظِيْمًا ﴿٧٣﴾

**आणि जर तुम्हास अल्लाहतआलाची काही कृपा[४] मिळून जाईल, तर अशाप्रकारे (वागतात) जणू तुमच्यात (आणि) त्यांच्यांत मैत्रीच[५] नव्हती, म्हणतात अरेरे! मी पण त्यांच्या बरोबर असतो, तर मोठेच यश मिळविले असते[६] ७३**

१) अल्लाह व रसूलच्या आज्ञापालनाचे प्रतिफळ दाखविण्यात येत आहे. यासाठी हदीसमध्ये येते, ''मनुष्य त्यांच्याच बरोबर असेल, ज्यांच्याशी त्याचे प्रेम असेल.'' (स.बुखारी व स.मुस्लीम) ह.अनस् ﷺ म्हणतात, ''सहाबांना ﷺ जेवढा आनंद या रसूल ﷺच्या फरमानाने झाला, एवढा आनंद कधी झाला नव्हता.'' कारण की, ते स्वर्गात सुद्धा रसूल ﷺ ची जवळीक पसंत करीत असत. याच्या अवतरणाच्या कारणाच्या रिवायतीत म्हटले आहे, की काही सहाबांनी ﷺ नबी ﷺ ला ही विनंती केली, ''अल्लाहतआला आपणास स्वर्गात उच्चपदी विराजमान करील आणि आम्हाला यापेक्षा खालच्या दर्जाचे ठिकाणच मिळेल आणि आम्ही अशाप्रकारे त्या सहवास आणि जवळीक आणि दर्शनापासून वंचित राहू; जे आम्हाला या जगात मिळते'' म्हणून अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत करून, त्यांचे समाधान केले. (इब्ने कसीर) काही सहाबांनी विशेष म्हणून नबी ﷺ जवळ स्वर्गात जवळीकची विनंती केली. ज्यावर नबी ﷺ नी, त्यांना भरपूर नफिल नमाजी पढण्याची ताकीद केली. ''बस् तुम्ही भरपूर सिज्द्यांसह माझी मदत करा.'' (स.मुस्लीम) एका आणखी हदीसमध्ये आहे, ''सत्य बोलणारा, आणि अमानतदार व्यापारी, हे पैगंबर, सत्यवादी आणि हुतात्म्यांबरोबर असेन,'' (तिर्मिझी) सिद्दिकियत ईमानाची संपूर्णता, आज्ञापालनाच्या संपूर्णतेचे नांव आहे. पैगंबरीनंतर याचे स्थान आहे. उम्मते मोहम्मदीया मध्ये या स्थानांत ह.अबुबकर सिद्दीक ﷺ सर्वांत प्रिय आहेत. म्हणूनच एक मताने पैगंबर लोकांव्यतिरिक्त ते नबी ﷺ च्या नंतर श्रेष्ठ आहेत. पुण्यवान तो आहे, जो अल्लाहचे हक्क आणि सेवकांचे हक्क संपूर्ण रित्या अदा करीन आणि त्यांच्यात कोताही करणार नाही.

२) 'हिजरूकुम्' आपला बचाव करा; शस्त्रास्त्रे आणि युद्ध साहित्य आणि दुसऱ्या साधनांनी.

३) हे दांभिकांचे वर्णन आहे. मागेपुढे करण्याचा अर्थ 'जिहाद' करण्याला टाळाटाळ करीत आणि मागे राहून जात.

४) युध्दात विजय वर्चस्व आणि युध्दातील मिळालेला माल.

५) म्हणजे, जणू ते तुमच्या धर्मवाल्यांमधून नाहीत. परंतु अनोळखी आहेत.

६) म्हणजे युद्धातील मिळालेल्या मालात वाटा घेतला असता. जो दुनियावाल्यांचा सर्वांत महत्त्वाचा उद्देश असतो.

فَلْيُقَاتِلْ فِي سَبِيلِ اللّٰهِ الَّذِينَ يَشْرُونَ الْحَيٰوةَ الدُّنْيَا بِالْاٰخِرَةِ ۚ وَمَنْ يُّقَاتِلْ فِي سَبِيلِ اللّٰهِ فَيُقْتَلْ اَوْ يَغْلِبْ فَسَوْفَ نُؤْتِيهِ اَجْرًا عَظِيمًا ﴿٧٤﴾

बस, जे लोक ऐहिक जीवनाला, परलोकाच्या बदल्यात विकून चुकले आहेत[१], त्यांना अल्लाहतआलाच्या मार्गांत 'जिहाद' करावयास पाहिजे, आणि जो मनुष्य अल्लाहतआलाच्या मार्गात 'जिहाद' करताना 'हौतात्म्य' पावेल, किंवा विजयी होईल, खचितच् आम्ही त्याला फार मोठे प्रतिफळ देऊ ७४

وَمَا لَكُمْ لَا تُقَاتِلُونَ فِي سَبِيلِ اللّٰهِ وَالْمُسْتَضْعَفِينَ مِنَ الرِّجَالِ وَالنِّسَاءِ وَالْوِلْدَانِ الَّذِينَ يَقُولُونَ رَبَّنَا اَخْرِجْنَا مِنْ هٰذِهِ الْقَرْيَةِ الظَّالِمِ اَهْلُهَا ۚ وَاجْعَلْ لَّنَا مِنْ لَّدُنْكَ وَلِيًّا ۚ وَّاجْعَلْ لَّنَا مِنْ لَّدُنْكَ نَصِيرًا ﴿٧٥﴾

बरे काय कारण आहे की, तुम्ही अल्लाहच्या मार्गात आणि त्या दुर्बल पुरूष आणि स्त्रिया आणि लहान लहान बालकांची सुटका करण्यासाठी 'जिहाद' न करावे? जे अशी प्रार्थना करतात, की हे आमच्या पालनकर्त्या! या जालिमांच्या वस्तीतून आम्हाला मुक्त कर; आणि आमच्यासाठी स्वत: आपल्यापासून हिमायत करणारे आणि (आमचे) काम करणारे निश्चित करून दे ; आणि आमच्यासाठी खास; आपल्या जवळून मददगार बनव[२] ७५

اَلَّذِينَ اٰمَنُوا يُقَاتِلُونَ فِي سَبِيلِ اللّٰهِ ۚ وَالَّذِينَ كَفَرُوا يُقَاتِلُونَ فِي سَبِيلِ الطَّاغُوتِ فَقَاتِلُوا اَوْلِيَاءَ الشَّيْطٰنِ ۚ اِنَّ كَيْدَ الشَّيْطٰنِ كَانَ ضَعِيفًا ﴿٧٦﴾

ज्या लोकांनी ईमान आणले आहे; ते तर अल्लाहच्या मार्गांत 'जिहाद' करतात आणि ज्या लोकांनी 'कुफ्र' केले आहे, ते तागूतच्या (इतर उपास्यांच्या) मार्गात लढतात[३]. बस तुम्ही शैतानांच्या दोस्तांशी युद्ध करा आणि विश्वास ठेवा की, शैतानी धोका (फारच भुसभुसीत आणि) फारच दुर्बल आहे[४] ७६

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِينَ قِيلَ لَهُمْ كُفُّوا اَيْدِيَكُمْ وَاَقِيمُوا الصَّلٰوةَ وَاٰتُوا الزَّكٰوةَ ۚ فَلَمَّا كُتِبَ عَلَيْهِمُ الْقِتَالُ اِذَا فَرِيقٌ مِّنْهُمْ يَخْشَوْنَ النَّاسَ كَخَشْيَةِ اللّٰهِ اَوْ اَشَدَّ خَشْيَةً ۚ وَقَالُوا رَبَّنَا لِمَ كَتَبْتَ عَلَيْنَا الْقِتَالَ ۚ لَوْلَا اَخَّرْتَنَا اِلٰى اَجَلٍ قَرِيبٍ ۗ قُلْ مَتَاعُ الدُّنْيَا قَلِيلٌ ۚ وَالْاٰخِرَةُ خَيْرٌ لِّمَنِ اتَّقٰى وَلَا تُظْلَمُونَ فَتِيلًا ﴿٧٧﴾

काय आपण त्यांना पाहिले नाही, ज्यांना हुकूम देण्यात आला होता की, आपल्या हातांना थांबवून ठेवा आणि नमाजी पढत रहा. आणि जकात अदा करीत रहा. मग जेव्हा त्यांना जिहादचा हुकूम देण्यांत आला, तर त्याचवेळी त्यांच्यातील एक समूह लोकांना अशाप्रकारे भिऊ लागला, जसे अल्लाहतआलाचे भय असावे, किंबहुना यापेक्षाही जास्त. आणि म्हणू लागले, हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्यावर जिहाद कां फर्ज करून टाकले[५]? का आम्हास थोडेसे जीवन आणखी का नाही जगू दिले[६]? आपण सांगून टाका की, ऐहीक फायदा तर फारच अल्प आहे आणि सदाचरणी लोकांसाठी तर परलोकच उत्तम आहे आणि तुमच्यावर एका दोऱ्याइतका सुद्धा अन्याय केला जाणार नाही ७७

१) मोमिनांनी त्या लोकांबरोबर लढावे, ज्यांनी परलोक विकून इहलोक खरीदला, म्हणजे ज्यांनी दुनियेच्या थोड्याशा संपत्तीसाठी, आपल्या धर्माला विकून टाकले. याच्याने अभिप्रेत दांभिक आणि काफिर होतील. (इब्ने कसीरने हाच अर्थ वर्णन केला आहे.)

२) जालिमांच्या वस्तीने अभिप्रेत (अवतरणाच्या दृष्टीकोनातून) मक्का आहे. हिजरत नंतर तेथे शिल्लक राहिलेले मुसलमान, विशेष करून म्हातारे पुरूष, स्त्रिया आणि मुले, काफिरांच्या जुलूम व अत्याचाराने कंटाळून, अल्लाहतआलाजवळ मदतीची याचना करीत होते. अल्लाहतआलाने मुसलमानांना याची जाणीव करून म्हटले, की तुम्ही वृद्ध, पुरूष, स्त्रिया आणि लहान मुले यांना काफिरांपासून मुक्ती देण्यासाठी 'जिहाद' का करीत नाही? या महावाक्याचा आधार घेत, धर्म पंडीतांनी (उल्मांनी) म्हटले आहे की, ज्या इलाख्यांमध्ये मुसलमान अशाप्रकारे जुलूम आणि अत्याचाराचे बळी आणि काफिरांकडून चोहोंबाजूने घेरलेले असतील, तर दुसऱ्या मुसलमानांवर हे कर्तव्य लागू होते की, त्या काफिरांच्या जुलूम व अत्याचारापासून त्यांना वाचविण्यासाठी 'जिहाद' करावे. हा 'जिहाद' चा दुसरा प्रकार आहे. पहिला प्रकार आहे. धर्माच्या प्रचार आणि प्रसारासाठी आणि अल्लाहच्या कलम्यांच्या वर्चस्वासाठी लढणे. ज्याचे वर्णन या पूर्वीच्या महावाक्यांमध्ये आणि यानंतरच्या महावाक्यांमध्ये आहे.

३) मोमिन आणि काफिर दोघांना युद्धांची आवश्यकता येत असते; परंतु दोघांच्या युद्धाच्या उद्देशात मोठा फरक आहे. मोमिन अल्लाहसाठी लढतो. केवळ ऐहीक प्राप्तीसाठी किंवा मुलुखगिरीसाठी नाही, तर काफिरांचा उद्देश दुनिया आणि तीपासून मिळणारे फायदे असतात.
४) मोमिनांना याची जाणिव करून देण्यांत येत आहे की, अल्लाहशिवाय जे इतरांसाठी लढतात (तागूती) त्यांच्या उद्देश्यांचा धोका आणि चालबाजी दुर्बल असतात. त्यांच्या जाहीर रीत्या दिसणाऱ्या सामुग्रीच्या विपुलतेला आणि संख्या बाहुल्याला भिऊ नका. तुमचे ईमानी सामर्थ्य आणि जिहादच्या इच्छेच्या मुकाबल्यात हे शैतानी धोके थांबू शकत नाही.
५) मक्केमध्ये मुसलमान संख्या आणि साधन सामुग्रीच्या दृष्टीने लढण्यास योग्य नव्हते; म्हणून मुसलमानांची इच्छा असूनसुद्धा त्यांना युद्धापासून थांबवून ठेवण्यांत आले आणि दोन गोष्टींची ताकीद करण्यात येत राहिली; एक ही की, काफिरांच्या अत्याचारपूर्ण वागणूकीला धैर्य आणि सहनशिलतेने सहन करा. आणि माफी व दुर्लक्षाने काम करावे. दुसरे हे की, नमाज, जकात आणि दुसऱ्या उपासना आणि शिक्षणावर अंमलबजावणी करावी; कारण की अल्लाहतआलाशी संबंध मजबूत पायांवर प्रस्थापित होऊन जावा. परंतु हिजरत नंतर, जेव्हा मदिनेमध्ये मुसलमानांची ताकद एकवटली तर तेव्हा त्यांना मग युद्धाची परवानगी देण्यात आली. आणि मग जेव्हा परवानगी देण्यात आली, तर काही लोकांनी कमजोरी आणि धाडसाचा अभाव दाखविला. यावर हे महावाक्य मक्केच्या काळांतील, त्यांच्या इच्छा आकांक्षाची जाणीव करून देऊन सांगण्यात येत आहे की, आता हे मुसलमान जिहादचा हुकूम ऐकून भयग्रस्त का होत आहे? जेव्हा की हा जिहादचा हुकूम स्वत: त्यांच्या इच्छेनुसार आहे.
**कुरआनी महावाक्यात फेरबदल** : महावाक्याचा पहिला भाग - ज्यांत 'कफ्फे अयदी' (युद्धापासून हात थांबविण्याचा) चा हुकूम आहे. याच्याने काही शेवटच्या मुकल्लीदीनने, ही दलील घेतली आहे की, नमाज मध्ये रूकूअमध्ये जातांना, आणि रुकूअ मधून उठतांना, रफउलयदैन करावयास नको; कारण की, अल्लाहतआलाने कुरआन करीममध्ये नमाजीच्या स्थितीत हातांना थांबवून ठेवण्याचा हुकूम दिला आहे. म्हणून या महाशयांनी या महावाक्याच्या शब्दांमध्ये फेरबदल केला. आणि अर्थात सुद्धा. म्हणजे शाब्दिक आणि आर्थिक दोहो प्रकारच्या फेरबदलाचे काम घेतले आहे. महावाक्य त्यांनी अशाप्रकारे उद्घृत केले आहे,''या अय्योहल लज़ीना कीला लहूम कुफ्फू अयदि कुम व अकीमुस्सलात'' आणि भाषांतर केले आहे, ''हे ईमानवाल्यांनो! आपल्या हातांना थांबवून ठेवा, जेव्हा तुम्ही नमाज पढाल.'' (तहकीक मसला रफउलयदैन मौ.अबु मआविया सफदर जालंधरी) वास्तविक कुरआन करीमची आयत ज्याप्रमाणे आहे, ती पाहिली जाऊ शकते. अशा प्रकारे याचा संबंध जवळून किंवा दुरून, रफउलयदैनच्या मसल्याशीपण नाही. परंतु वाटोळे होवो तकलीदी जमून जाण्याचे की, त्यांनी या महाशयांना कुरआनात शाब्दिक व आर्थिक दोन्ही प्रकारच्या फेरबदलाचे यहूदी कर्तृत्व अदा केले आहे आणि या महाशयांपूर्वी याच वर्तुळातील सुप्रसिद्ध बुजुर्ग मौ.महमुद हसन देवबंदी (अल्लाहतआला त्यांची चुक माफ करो!) नी सुद्धा हेच काम केले. त्यांनी तकलीदच्या पुराव्यासाठी आयत बनवून टाकली आणि सांगितले की, कुरआनामध्ये ही आयतसुद्धा नमूद आहे. ज्याने उलुल अम्र (फुकहा) सुद्धा त्यांचे अनुकरण करण्याला योग्य आहेत असे सिद्ध होते. ''फईन तनाज़ातुम फिशैईन फरूद्दूहू इलल्लाहे वर्रसूल व इला उलील अम्रे मिनकुम'' (इज़ाहुल अदिल्ला पृष्ठ - ९७, दुसरी आवृत्ती १३३० हिजरी) वास्तविक कुरआनामध्ये, 'वइला उलील अम्रे मिनकुम' ज्यावर पुराव्याची मदार आहे, नमुदच नाही. फइलल्लाहिल मुशतकी! लक्षात ठेवावे की ही दुसरी आवृत्ती ३० वर्षानंतर प्रकाशित झाली आहे. परंतु यात सुद्धा ही आयत पहिल्या आवृत्तीप्रमाणे तशीच राहिली आहे. परंतु सर्व पुरावाच याच तुकड्याने आहे, जो आपल्याकडून वाढवून घेतला आहे. कुरआनाने यहूद्यांच्या बाबतीत याचसाठी सांगितले होते, 'इत्तखज़ू अहबारहुम व रूहबानहुम अरबाबम् मिन दुनिल्लाह्'' (सू. तौबा-३१) या लोकांनी अल्लाहला सोडून आपल्या धर्मपंडितांना आणि संन्याशांना रब (पालनकर्ता) बनवून घेतले आहे.
६) याचे दुसरे भाषांतर असे पण केले आहे की, या जिहादच्या हुकूमाला आणखी काही मुदतीसाठी आणखी का पुढे ढकलून देण्यात आले नाही? म्हणजे 'अजलिन करीब' ने अभिप्रेत मृत्यू किंवा अनिवार्य जिहादची मुदत आहे. (तफसीर इब्ने कसीर)

أَيْنَ مَا تَكُونُوا يُدْرِكْكُمُ الْمَوْتُ وَلَوْ كُنْتُمْ فِي بُرُوجٍ مُشَيَّدَةٍ ۗ وَإِنْ تُصِبْهُمْ حَسَنَةٌ يَقُولُوا هَٰذِهِ مِنْ عِنْدِ اللَّهِ ۖ وَإِنْ تُصِبْهُمْ سَيِّئَةٌ يَقُولُوا هَٰذِهِ مِنْ عِنْدِكَ ۚ قُلْ كُلٌّ مِنْ عِنْدِ اللَّهِ ۖ فَمَالِ هَٰؤُلَاءِ الْقَوْمِ لَا يَكَادُونَ يَفْقَهُونَ حَدِيثًا ﴿٧٨﴾

**तुम्ही जेथे कोठे असाल, मृत्यू तुम्हास येऊन गाठेल, जरी तुम्ही मजबुत बुरूजांत असाल[१] आणि जर काही भलाई त्यांना मिळते, तर म्हणतात ही अल्लाहतआलाकडून आहे; आणि जर काही वाईट पोहचते, तर म्हणतात ही तुझ्याकडून आहे[२]; त्यांना सांगून टाका की हे सर्व अल्लाहतआलाकडून आहे त्यांना काय झाले आहे की, कुणी गोष्ट समजून घ्यायलाही तयार नाहीत[३] (७८)**

مَا أَصَابَكَ مِنْ حَسَنَةٍ فَمِنَ اللَّهِ ۖ وَمَا أَصَابَكَ مِنْ سَيِّئَةٍ فَمِنْ نَفْسِكَ ۚ وَأَرْسَلْنَاكَ لِلنَّاسِ رَسُولًا ۚ وَكَفَىٰ بِاللَّهِ شَهِيدًا ﴿٧٩﴾

**तुला जो चांगुलपणा भेटतो, तो अल्लाहतआलाकडून आहे.[४] आणि जो वाईटपणा भेटतो तो तुझ्या जिवामुळे आहे[५]. आम्ही तुला सर्व लोकांकडे संदेश पोहोचवणारा बनवून पाठविले आहे, आणि अल्लाहतआला साक्षीला पुरेसा आहे (७९)**

१) अशा दुर्बल मुसलमानांना समजाविण्याकरीता सांगण्यात येत आहे की, एक तर ही दुनिया क्षणभंगुर आणि याचा फायदा तात्कालिक आहे; ज्याच्या करीता तुम्ही काही मुदतीची अपेक्षा करतात. याच्या मुकाबल्यात परलोक फार उत्तम आणि चिरकालिक आहे. ज्याचे तुम्ही अल्लाहतआलाच्या आज्ञापालनाने हक्कदार व्हाल. दुसरे असे की, जिहाद करा अथवा करू नका, मृत्यू तर आपल्या वेळेवर येऊन पोहचेल; जरी तुम्ही मजबूत किल्ल्यांमध्ये बंदिस्त होऊन बसून रहाल, मग जिहाद पासून पळ काढण्यात काय फायदा? 'मजबूत बुरूजांनी' अभिप्रेत, मजबूत आणि उंच तटबंदी वाले किल्ले आहेत.

**मलहुजा : –** काही मुसलमानांची ही भीती कारण की, नैसर्गिक भीती होती; अशाचप्रकारे उशीर करण्याची इच्छा सुद्धा आक्षेप किंवा नकार म्हणून नव्हती; परंतु परिणाम होता, म्हणून अल्लाहतआलाने याला माफ करून टाकले आणि फारच मजबूत पुराव्यांनी त्यांना आधार आणि धैर्य प्रदान केले.

२) येथून पुन्हा दांभिक लोकांच्या गोष्टींचे वर्णन करण्यात येत आहे. मागे होऊन गेलेल्या उम्मतींमधून नाकारणाऱ्यांप्रमाणे, त्यांनीपण म्हटले की, भलाई (सुस्थिती, धनधान्याची विपुलता, संतती आणि संपत्तीची अधिकता वगैरे) अल्लाहकडून आहे. आणि वाईट अवस्था (दुष्काळ, धनसंपत्तीची कमी वगैरे) हे मोहम्मद ﷺ तुमच्या कडून आहे; म्हणजे तुझा धर्म स्वीकारल्यामुळे, हे संकट आले आहे. ज्याप्रमाणे मूसा عليه السلام आणि फिरऔनच्या समाजाचे बाबतीत अल्लाहतआलाने म्हटले, ''जेव्हा त्यांना भलाई पोहचते तर म्हणतात, ही आमच्यासाठी आहे (म्हणजे आम्ही याचे हक्कदार आहोत.) आणि जेव्हा वाईट गोष्ट पोहचते तर ह.मूसा عليه السلام आणि त्यांच्या अनुयायांचे अवलक्षण समजतात. (म्हणजे नाऊजो बिल्लाह! त्यांच्या दळभद्रीपणाचा परिणाम दाखवतात) (सू. अल् आअराफ–१३१)

३) म्हणजे भलाई आणि वाईटपणा दोन्ही अल्लाहतआलाकडूनच आहे. परंतु हे लोक अज्ञान आणि अन्यायाच्या अधिकतेमुळे, या गोष्टीला समजत नाही.

४) म्हणजे त्याच्या कृपा आणि दयेमुळे आहे. म्हणजे कोण्या पुण्याचा किंवा आज्ञापालनाचा बदला नाही. कारण की, पुण्य करण्याची सुबुद्धी देणारा पण अल्लाहतआलाच आहे. याशिवाय त्याच्या देणग्या इतक्या बेसुमार आहेत की, एका माणसाच्या उपासना आणि आज्ञापालन त्याच्या तुलनेत काहीच सामर्थ्य बाळगीत नाही. म्हणून एका हदीसमध्ये नबी ﷺ नी आज्ञाविले, ''स्वर्गात जो कोणी जाईल, केवळ अल्लाहच्या दयेने जाईल. (आपल्या कर्मांच्या कारणाने नाही.) सहाबांनी رضي الله عنهم म्हटले या रसूलुल्लाह ﷺ! 'वला अन्ता' आपण सुद्धा अल्लाहच्या दयेशिवाय स्वर्गात जाणार नाहीत? आपण ﷺ नी म्हटले, हां! जोपर्यंत अल्लाह मला पण आपल्या दयेच्या छत्राखाली घेणार नाही, स्वर्गात जाणार नाही. (स.बुखारी)

५) या वाईट गोष्टीपण जरी अल्लाहच्या मर्जीने येत असल्या जसे की, ''कुल्लुन मिन् इंदिल्लाह'' ने स्पष्ट आहे; परंतु ही वाईट गोष्ट कुण्या पापाची शिक्षा किंवा त्याचा बदला असतो. फर्माविले म्हणून की हे तुमच्या जीवामुळे आहे; म्हणजे तुमच्या चुका,कमतरता आणि गुन्ह्यांचा परिणाम आहे. ज्याप्रमाणे आहे,''तुम्हांवर जेही संकट येते, तो तुमच्या कर्मांचा परिणाम आहे, आणि अल्लाहतआला पुष्कळसे अपराध तर क्षमाच करून टाकतो.'' (सू. शुरा – ३०)

مَنْ يُّطِعِ الرَّسُوْلَ فَقَدْ اَطَاعَ اللّٰهَ ۚ وَمَنْ تَوَلّٰى فَمَآ اَرْسَلْنٰكَ عَلَيْهِمْ حَفِيْظًا ﴿٨٠﴾

पैगंबराचे (सल्ल.) जो आज्ञापालन करील,त्याने अल्लाहतआलाचे आज्ञापालन केले; आणि जो तोंड फिरवेल तर आम्ही आपणास त्याचेवर काही दरोगा बनवून पाठविले नाही (٨٠)

وَيَقُوْلُوْنَ طَاعَةٌ ۡ فَاِذَا بَرَزُوْا مِنْ عِنْدِكَ بَيَّتَ طَآئِفَةٌ مِّنْهُمْ غَيْرَ الَّذِيْ تَقُوْلُ ؕ وَاللّٰهُ يَكْتُبُ مَا يُبَيِّتُوْنَ ۚ فَاَعْرِضْ عَنْهُمْ وَتَوَكَّلْ عَلَى اللّٰهِ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ وَكِيْلًا ﴿٨١﴾

आणि हे तर म्हणतात की, आज्ञापालन आहे; मग तेव्हा आपल्यापासून उठून बाहेर जातात; तर त्यांच्यातून एक समूह जी गोष्ट (तुम्ही किंवा त्यांनी) म्हटली आहे, याच्या विरूद्ध रात्री खलबत करतात(१); त्यांच्या रात्रीच्या गोष्टी अल्लाहतआला लिहीत आहे. म्हणून आपण त्यांच्याकडून विन्मुख होऊन जावे आणि अल्लाहवर भरोसा ठेवावा. अल्लाहतआला पुरेसा कार्यसाधक आहे (٨١)

اَفَلَا يَتَدَبَّرُوْنَ الْقُرْاٰنَ ؕ وَلَوْ كَانَ مِنْ عِنْدِ غَيْرِ اللّٰهِ لَوَجَدُوْا فِيْهِ اخْتِلَافًا كَثِيْرًا ﴿٨٢﴾

काय हे लोक कुरआनात मनन करीत नाही? जर हे अल्लाह तआलाशिवाय कुण्या दुसऱ्याकडून असते; तर खरोखरीच यांत काही मतभेद आढळून आला असता(२) (٨٢)

وَاِذَا جَآءَهُمْ اَمْرٌ مِّنَ الْاَمْنِ اَوِ الْخَوْفِ اَذَاعُوْا بِهٖ ؕ وَلَوْ رَدُّوْهُ اِلَى الرَّسُوْلِ وَاِلٰٓى اُولِى الْاَمْرِ مِنْهُمْ لَعَلِمَهُ الَّذِيْنَ يَسْتَنْۢبِطُوْنَهٗ مِنْهُمْ ؕ وَلَوْلَا فَضْلُ اللّٰهِ عَلَيْكُمْ وَرَحْمَتُهٗ لَاتَّبَعْتُمُ الشَّيْطٰنَ اِلَّا قَلِيْلًا ﴿٨٣﴾

जेव्हा यांना कधी कुणी बातमी शांतीची किंवा भयाची मिळते, तेव्हा तिला जाहीर करणे, सुरू करून दिले; वास्तविक जर हे लोक तिला रसूल (सल्ल.) कडे आणि आपल्यातून अशा गोष्टींच्या मुळापर्यंत पोहचणाऱ्यापर्यंत पोहचवून दिली असती, तर ते तिची हकीकत जाणून घेते; जे वस्तुस्थिती जाणण्याची क्षमता बाळगतात(३); आणि अल्लाहतआलाची कृपा आणि त्यांची दया जर आपणावर नसती तर थोड्या लोकांशिवाय तुम्ही सर्व शैतानाचे अनुयायी बनून गेला असता (٨٣)

فَقَاتِلْ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ۚ لَا تُكَلَّفُ اِلَّا نَفْسَكَ وَحَرِّضِ الْمُؤْمِنِيْنَ ۚ عَسَى اللّٰهُ اَنْ يَّكُفَّ بَاْسَ الَّذِيْنَ كَفَرُوْا ؕ وَاللّٰهُ اَشَدُّ بَاْسًا وَّاَشَدُّ تَنْكِيْلًا ﴿٨٤﴾

आपण अल्लाहच्या मार्गांत जिहाद करीत रहा; फक्त व्यक्तीश: आपणास हुकूम देण्यांत येत आहे; हां! ईमानवाल्यांना (याकडे वळण्याचे) आवाहन करीत रहा! फार शक्यता आहे की, अल्लाहतआला काफिरांच्या युद्धाला थांबवून टाकेल. आणि अल्लाहचा जोर जास्त खंबीर आणि त्याची शिक्षा फारच कडक आहे. (٨٤)

مَنْ يَّشْفَعْ شَفَاعَةً حَسَنَةً يَّكُنْ لَّهٗ نَصِيْبٌ مِّنْهَا ۚ وَمَنْ يَّشْفَعْ شَفَاعَةً سَيِّئَةً يَّكُنْ لَّهٗ كِفْلٌ مِّنْهَا ؕ وَكَانَ اللّٰهُ عَلٰى كُلِّ شَيْءٍ مُّقِيْتًا ﴿٨٥﴾

जो मनुष्य कोण्या पुण्याची किंवा चांगल्या कामाची शिफारस करील, त्याला पण त्याचा काही वाटा मिळेल; आणि जो पापाची किंवा वाईट कामाची शिफारस करील त्यांत ही त्याचा काही वाटा आहे. आणि अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीवर सामर्थ्य बाळगून आहे (٨٥)

وَاِذَا حُيِّيْتُمْ بِتَحِيَّةٍ فَحَيُّوْا بِاَحْسَنَ مِنْهَآ اَوْ رُدُّوْهَا ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ حَسِيْبًا ﴿٨٦﴾

النصف

आणि जेव्हा तुम्हास सलाम केला जाईल; तर तुम्ही त्यापेक्षा चांगले उत्तर द्या; किंवा त्याच शब्दांनी उत्तर द्या(४). नि:संशय अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीचा हिशेब घेणारा आहे (٨٦)

१) म्हणजे हे दांभिक लोक आपल्या बैठकीत, ज्या गोष्टी जाहीर करतात, रात्री यांच्या विरूद्ध गोष्टी करतात, आणि कट कारस्थाने करतात. आपण ﷺ नी त्यांची उपेक्षा करावी. आणि अल्लाहवर भरोसा ठेवावा. त्यांच्या गोष्टी आणि कारस्थाने आपणास काहीही नुकसान पोहचवू शकणार नाही. कारण की, आपला पक्ष धरणारा (वकील) आणि कार्यसाधक अल्लाह आहे.

२) कुरआन करीम पासून मार्गदर्शन मिळविण्यासाठी त्यांत चिंतन आणि मनन करण्याची ताकीद करण्यात येत आहे. आणि त्याची सत्यता पडताळण्यासाठी एक प्रमाण पण दाखविण्यात आले आहे, की जर ही कोण्या मनुष्याची बनविलेली वाणी असती (जसा की, काफिरांचा विचार आहे) तर याचे विषय आणि वर्णन केलेल्या

घटना यामध्ये एक दुसऱ्याच्या विरूद्ध झाल्या असत्या. कारण की, हे काही लहानसे पुस्तक नाही. एक फार मोठे आणि तपशील असलेले पुस्तक आहे. त्याचा प्रत्येक भाग चमत्कार व प्रसंगानुरूप वर्णनशैली यामुळे लोकप्रिय आहे. वास्तविक मनुष्याच्या लिहिलेल्या मोठ्या लेखनांत भाषेची सुसुत्रता, स्पष्टीकरण आणि वर्णनशैली सतत स्थिर असत नाही. दुसरे असे की, याच्यांत मागील राष्ट्रांच्या घटनापण वर्णन करण्यांत आल्या आहेत. ज्यांना अल्लाह, जो अदृष्टाचा ज्ञाता आहे, त्याचेशिवाय कोणी दुसरा वर्णन करू शकत नाही. तिसरे असे की, या गोष्टीत आणि घटनांत आपसात विरोधाभास आणि विसंगती नाही. तसेच त्याचे छोट्यात छोटे अंग कुरआनाच्या कुण्या मूळ भागाच्या विरोधात नाही. वास्तविक जर एक मनुष्य मागे घडलेल्या घटनांचे वर्णन करील, तर क्रमवारीचे टप्पे तुटून जातात. आणि त्यांच्या तपशिलांत विरोधाभास आणि विसंगती घडून येते. कुरआन करीम या सर्व मानवी कमतरतेपासून मुक्त असण्याचा स्वच्छ अर्थ असा आहे की, ही खचितच् अल्लाहची वाणी आहे; जे त्याने देवदूतामार्फत आपले शेवटचे पैगंबर, ह.मोहम्मद रसूल ﷺ वर अवतरित केले.

३) ही काही दुर्बल आणि उतावळ्या मुसलमानांची वर्तणूक त्यांच्यात सुधारणा घडवून आणण्यांच्या दृष्टीने वर्णन केली जात आहे. शांतीच्या वार्तेने अभिप्रेत मुसलमानांची सफलता आणि शत्रुला गारद करून देणे आणि त्यांच्या पराभवाची बातमी आहे. (जिला ऐकून शांती आणि संतोषाची लाट येते; आणि ज्याच्या परिणामांत कधी कधी आवश्यकतेपेक्षा जास्त फाजिल उत्साह निर्माण होतो. जे नुकसानाला कारणीभूत होऊ शकते) आणि भीतीच्या बातमीने अभिप्रेत मुसलमानांचा पराभव आणि त्यांचे ठार व गारद होण्याची बातमी आहे. (ज्यामुळे मुसलमानांमध्ये नैराश्य पसरण्याचे आणि त्यांचे धैर्य व धाडस कमी होण्याचा संभव असतो.) म्हणून त्यांना सांगण्यांत येत आहे की, अशा प्रकारच्या बातम्या, मग त्या शांतीच्या असोत की भयाच्या, त्यांना ऐकून सर्वसाधारण लोकांत पसरविण्याऐवजी रसूल ﷺ कडे पोहचवून द्या. किंवा, जे लोक ज्ञानी आणि चौकशी करणारे आहेत, त्यांना पोहचवून द्या; कारण की, त्यांनी हे पहावे की, ही बातमी बरोबर आहे का चूक? जर बरोबर असेल, तर या वेळी मुसलमानांना त्याची कल्पना देणे फायद्याचे आहे किंवा कल्पना न देणे फायद्याचे आहे? हे तत्त्वतर तसे सर्वसाधारण परिस्थितीत मोठे महत्त्वाचे आणि फारच फायदेकारक आहे. परंतु ऐन युद्धाच्या वेळी, तर त्याचे महत्त्व आणि फायदेशीरपणा फारच जास्त आहे. 'नबत' त्या पाण्याला म्हणतात, जे विहीर खोदतांना सर्वप्रथम निघते. याचसाठी 'इस्तिंबात' चौकशी आणि गोष्टीच्या मुळापर्यंत जाण्याला म्हणण्यात येते (फत्हुल कदीर)

४) 'तहिय्यतुन' चा अर्थ आहे, आयुष्य वाढविण्याची प्रार्थना, येथे हे सलाम करण्याच्या अर्थात आहे. (फत्हुल कदीर) जास्त चांगले उत्तर देण्याचे भाष्य हदीसमध्ये अशाप्रकारे आले आहे की, अस्सलाम व अलैकुमच्या उत्तरात 'रहमतुल्लाह' ची वाढ आणि अस्सलाम व अलैकुम व रहमुतुल्लाहच्या उत्तरात 'वबरकातोहू' वाढ करून देण्यात यावी. पण जर कोणी 'अस्सलाम अलैकुम व रहेमतुल्लाहे व बरकातोहू' म्हणेल, तर याच शब्दात उत्तर दिले जावे. (इब्ने कसीर) एका आणखी हदीसमध्ये आहे की, 'अस्सलाम अलैकुम' म्हटल्याने दहा पुण्य, याचे बरोबर 'रहमतुल्लाह'म्हटल्याने वीस पुण्य आणि 'बरकातोहू' पण म्हटल्याने, तीस पुण्य मिळतात. (मुसनद अहमद) लक्षांत ठेवावे हा हुकूम मुसलमानकरीता आहे. म्हणजे एक मुसलमान जेव्हा दुसऱ्या मुसलमानाला सलाम करेल परंतु अहले ज़िम्मा म्हणजे यहूदी व ख्रिस्ती यांना सलाम करावयाचा असेल, तर एकतर त्यांना सलाम करण्यात प्रथमत: (पहल) केली जाऊ नये; दुसरे वाढ न केली जावी; उलट फक्त 'व अलैकुम' ने उत्तर दिले जावे. (स.बुखारी व स. मुस्लिम्)

اَللّٰهُ لَاۤ اِلٰهَ اِلَّا هُوَ ؕ لَیَجۡمَعَنَّكُمۡ اِلٰی یَوۡمِ الۡقِیٰمَةِ لَا رَیۡبَ
فِیۡهِ ؕ وَمَنۡ اَصۡدَقُ مِنَ اللّٰهِ حَدِیۡثًا ﴿٨٧﴾

अल्लाह तो आहे, ज्याच्या शिवाय अन्य कोणी उपास्य नाही. तो तुम्हा सर्वांस कयामतच्या दिवशी खचितच जमा करील; ज्याच्या येण्यांत कुठलीही शंका नाही. अल्लाहतआला शिवाय सत्य गोष्ट सांगणारा आणखी कोण असेल? (८७)

فَمَا لَكُمۡ فِی الۡمُنٰفِقِیۡنَ فِئَتَیۡنِ وَاللّٰهُ اَرۡكَسَهُمۡ
بِمَا كَسَبُوۡا ؕ اَتُرِیۡدُوۡنَ اَنۡ تَهۡدُوۡا مَنۡ اَضَلَّ اللّٰهُ ؕ
وَمَنۡ یُّضۡلِلِ اللّٰهُ فَلَنۡ تَجِدَ لَهٗ سَبِیۡلًا ﴿٨٨﴾

तुम्हास काय झाले? की दांभिकांच्या बाबतीत दोन गट होत आहात[१]? त्यांना तर त्यांच्या कर्माच्या कारणाने अल्लाहतआलाने पालथे घालून दिले[२]. आता काय तुम्ही मन्सुबे बांधत आहात की, अल्लाहने मार्गभ्रष्ट केलेल्यांना तुम्ही सरळ मार्गावर आणून उभे करावे, ज्याला अल्लाहतआला मार्ग विसरवून देईन, तर त्याच्यासाठी तू कुठलाही मार्ग पावणार नाही[३] (८८)

وَدُّوۡا لَوۡ تَكۡفُرُوۡنَ كَمَا كَفَرُوۡا فَتَكُوۡنُوۡنَ سَوَآءً فَلَا
تَتَّخِذُوۡا مِنۡهُمۡ اَوۡلِیَآءَ حَتّٰی یُهَاجِرُوۡا فِیۡ سَبِیۡلِ اللّٰهِ ؕ
فَاِنۡ تَوَلَّوۡا فَخُذُوۡهُمۡ وَاقۡتُلُوۡهُمۡ حَیۡثُ وَجَدۡتُّمُوۡهُمۡ ۪
وَلَا تَتَّخِذُوۡا مِنۡهُمۡ وَلِیًّا وَّلَا نَصِیۡرًا ۙ﴿٨٩﴾

त्यांची तर इच्छा आहे की, ज्याप्रकारचे काफिर ते आहेत, तुम्हीही त्यांच्यासारखेच 'कुफ्र' करू लागावे; आणि मग सर्वांनी एक होऊन जावे. बस! जोपर्यंत हे इस्लाम करता (आपले) वतन सोडणार नाही; त्यांच्यातून कोणालाही सच्चा मित्र बनवू नका[४]. मग जर हे विन्मुख झाले, तर त्यांना धरा[५], आणि ठार करा, जेथे कोठे त्यांना पावाल[६]. खबरदार! त्यांच्यातून कोणाला आपला मित्र आणि मददगार समजून बसू नका (८९)

اِلَّا الَّذِیۡنَ یَصِلُوۡنَ اِلٰی قَوۡمٍۢ بَیۡنَكُمۡ وَبَیۡنَهُمۡ مِّیۡثَاقٌ
اَوۡ جَآءُوۡكُمۡ حَصِرَتۡ صُدُوۡرُهُمۡ اَنۡ یُّقَاتِلُوۡكُمۡ اَوۡ
یُقَاتِلُوۡا قَوۡمَهُمۡ ؕ وَلَوۡ شَآءَ اللّٰهُ لَسَلَّطَهُمۡ عَلَیۡكُمۡ فَلَقٰتَلُوۡكُمۡ ۚ
فَاِنِ اعۡتَزَلُوۡكُمۡ فَلَمۡ یُقَاتِلُوۡكُمۡ وَاَلۡقَوۡا اِلَیۡكُمُ
السَّلَمَ ۙ فَمَا جَعَلَ اللّٰهُ لَكُمۡ عَلَیۡهِمۡ سَبِیۡلًا ﴿٩٠﴾

त्यांच्याशिवाय, जे त्या समाजाशी संबंध ठेवत असतील, ज्यांच्याशी तुमचा करार होऊन चुकला आहे किंवा जो तुमच्याजवळ या स्थितीत येईल, की तुमच्याशी युद्ध करायला पण हिम्मत बाळगत नाही आणि आपल्या समाजाबरोबर सुद्धा युद्ध करायला पण हिम्मत बाळगत नाही[७]; आणि जर अल्लाहतआला इच्छिता, तर त्यांना तुमच्यावर वर्चस्व दिले असते; आणि ते तुमच्याशी खचितच् युद्ध करते[८]; मग जर हे लोक तुमच्याकडून एका बाजूला होऊन जातील, आणि तुमच्याशी युद्ध करणार नाही आणि तुमच्याकडे तहाचा संदेश वाढवतील[९], तर अल्लाहतआलाने तुमच्याकरीता त्यांच्याशी युद्ध करण्याचा कुठलाही मार्ग ठेवला नाही (९०)

سَتَجِدُوۡنَ اٰخَرِیۡنَ یُرِیۡدُوۡنَ اَنۡ یَّاۡمَنُوۡكُمۡ
وَیَاۡمَنُوۡا قَوۡمَهُمۡ ؕ كُلَّمَا رُدُّوۡۤا اِلَی الۡفِتۡنَةِ اُرۡكِسُوۡا
فِیۡهَا ۚ فَاِنۡ لَّمۡ یَعۡتَزِلُوۡكُمۡ وَیُلۡقُوۡۤا اِلَیۡكُمُ السَّلَمَ
وَیَكُفُّوۡۤا اَیۡدِیَهُمۡ فَخُذُوۡهُمۡ وَاقۡتُلُوۡهُمۡ حَیۡثُ
ثَقِفۡتُمُوۡهُمۡ ؕ وَاُولٰٓئِكُمۡ جَعَلۡنَا لَكُمۡ عَلَیۡهِمۡ سُلۡطٰنًا
مُّبِیۡنًا ﴿٩١﴾

तुम्हाला काही लोक असेपण आढळतील, ज्यांची (जाहीररीत्या) इच्छा आहे की, तुमच्यापासून पण सुरक्षित रहावे, आणि आपल्या समाजापासूनपण सुरक्षित रहावे[१०]. (परंतु) जेव्हा कधी कोणी त्यांना फंद फितुराकडे[११] पालटून नेईल, तेव्हा त्यांना त्यांत पालथे टाकून देण्यात येते. जर हे लोक तुमच्याशी अलिप्त न राहतील, आणि तुमच्याशी सलोख्याचे बोलणे करणार नाही; आणि आपले हात आवरून न घेतील[१२]; तर त्यांना पकडा आणि मारा, जेथे कोठेपण (त्यांना) पावाल आणि हेच ते लोक आहेत, ज्यांच्यावर आम्ही तुम्हास जाहीर सत्ता देऊन ठेवली आहे[१३] (९१)

१) ही विचारणा, नकारासाठी आहे. म्हणजे तुमच्या आपसात त्या दांभिकांबद्दल मतभेद असावयास नको होता. या दांभिकांनी अभिप्रेत ते आहेत, जे ओहुदच्या युद्धात मदीनेपासून काही दूर जाऊन परत येऊन गेले होते की, आमची गोष्ट मान्य केली गेली नाही. या दांभिकांच्या बाबतीत त्यावेळी मुसलमानांचे दोन गट होऊन गेले. एक गटाचे म्हणणे होते की, आम्हास त्या दांभिकांबरोबर सुद्धा लढावयास पाहिजे, दुसरा गट याला चांगल्या प्रयुक्तीच्या विरूद्ध समजत

होता.

२) 'कसबू' (कर्म) ने अभिप्रेत पैगंबरांना विरोध आणि 'जिहाद' ला आक्षेप आहे. 'अरकसहूम्' पालथा घालून दिले; म्हणजे ज्या कुफ्र आणि अज्ञानातून निघाले होते, त्यांतच पुन्हा व्यस्त करून दिले किंवा या कारणाने गारद करून टाकले.

३) ज्याला अल्लाह मार्ग भ्रष्ट करून टाकेन; म्हणजे सतत नकार आणि वंश श्रेष्ठत्वाच्या कारणे, त्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून टाकेन; त्यांना कोणी मार्ग दाखवूशकत नाही.

४) हिजरत (देशत्याग) या गोष्टीचा पुरावा राहिला की, हे आता खरेखरे मुसलमान होऊन गेले आहेत. या स्वरूपांत त्यांच्याशी मैत्री आणि प्रेम योग्य राहील.

५) म्हणजे जेव्हा तुम्हास त्यांच्यावर शक्ती आणि वर्चस्व प्राप्त होऊन जाईल.

६) म्हणजे खाना-ए-काबाच्या बाहेर असो किंवा खाना-ए-काब्यात.

७) म्हणजे ज्यांच्याशी युध्द करण्याचा हुकूम देण्यात येत आहे, याच्याने दोन प्रकारचे लोक वगळण्यात आले आहेत. एक ते लोक जे अशा समाजाशी संबंध राखतात, म्हणजे अशा समाजाचे घटक आहेत, किंवा त्यांच्या आश्रयांत आहेत, ज्या समाजाशी तुमचा करार आहे. दुसरे ते जे तुमच्याजवळ या स्थितीत येतात; की त्यांची अंत:करणे या गोष्टीला तयार नाहीत की, ते आपल्या समाजाला मिळून तुमच्याशी किंवा तुम्हास मिळून आपल्या समाजाशी युद्ध करतील. म्हणजे तुमच्या बाजूने लढणे पसंत करीत नाही. तसेच तुमच्या विरूद्ध लढणे ही पसंत करीत नाही.

८) म्हणजे हा अल्लाहतआलाचा उपकार आहे की, त्यांना युद्धापासून वेगळे करून दिले, नाही तर जर अल्लाहतआला त्यांची अंत:करणे आपल्या समाजाच्या बाजूने लढण्याचा विचार निर्माण करून देता. तर ते खचितच् तुमच्याशी लढते. म्हणून जर खरोखरच हे लोक युद्धापासून अलिप्त राहतील. तर तुम्ही सुद्धा त्यांच्या विरोधात पावले उचलू नका.

९) अलिप्त रहावे, लढू नये तुमच्याकडे तहाचा संदेश पाठवतील या सर्वांचा मतीतार्थ एकच आहे. ताकीद आणि स्पष्टीकरणासाठी तीन शब्द वापरले गेले आहेत. यासाठी की मुसलमानांनी त्यांच्या बाबतीत सावध रहावे. कारण की जे युद्धापूर्वीच वेगळे होऊन गेले आहेत; आणि त्यांचे हे वेगळे रहाणे मुसलमानांच्या फायद्याचे पण आहे; याचसाठी याला अल्लाहतआलाने उपकार म्हणून वर्णन केले आहे; म्हणून यांच्या बाबतीत छेडाछेडीची वर्तणूक आणि त्यांच्याशी अविश्वासाची वर्तणूक त्यांच्यातसुद्धा विरोध करण्याची व शत्रुत्व करण्याची भावना निर्माण करूंशकते; जी मुसलमानांसाठी हानीकारक आहे. म्हणून जो पर्यंत ते चर्चित स्थितीवर कायम राहतील; त्यांच्याशी लढू नका! याचे उदाहरण तो समूहपण आहे, ज्यांचा संबंध बनु हाशिमशी होता. हे बद्रच्या युद्धाच्या दिवशी, मक्केच्या मुशरिकांबरोबर युद्धाच्या मैदानांत तर आले होते परंतु ते त्यांच्या बरोबर मिळून मुसलमानांशी युद्ध करणे पसंद करीत नव्हते. जसे ह.अब्बास ﷺ (जे रसूल ﷺ चे चुलते) जे आतापर्यंत मुसलमान झाले नव्हते. म्हणूनच उघडरीत्या तर काफिरांच्या छावणीत होते; याचसाठी नबी ﷺ नी ह. अब्बास ﷺ ला ठार करण्याला मना केले; आणि त्यांना फक्त कैदी बनविण्यावरच पुरेसे समजण्यांत आले. 'सिल्म' येथे 'मुसालमः' म्हणजे तहाच्या अर्थात आहे.

१०) हे एका तिसऱ्या समूहाचे वर्णन आहे; जो दांभिकांचा होता. हे मुसलमान जवळ येत तेव्हा इस्लामचे प्रदर्शन करीत; यासाठी की, मुसलमानांपासून सुरक्षित रहावे. आपल्या समाजाजवळ जात, तेव्हा शिर्क आणि मूर्तीपूजा करीत. कारण की त्यांनी यांना आपल्याच धर्माचे समजावे; आणि अशाप्रकारे दोघांकडून फायदा मिळवत.

११) 'फितना' ने अभिप्रेत 'शिर्क' सुद्धा होऊ शकते. 'उरकीसु फिहा' त्याच 'शिर्क' मध्ये पालटून नेले जातात किंवा 'फितना' ने अभिप्रेत युद्ध आहे की, जेव्हा त्यांना मुसलमानांबरोबर लढण्यास बोलाविले, म्हणजे पलटविले जाते, तर ते यावर तयार होऊन जातात.

१२) 'युलकु' आणि 'यकुफ्फु' चा अतफ 'यातज़िलूकुल' आहे म्हणजे सर्व नकाराच्या अर्थात आहे.

१३) या गोष्टीवर की, खरोखरच यांच्या मनांत 'निफाक' (दांभिकपणा) आणि त्यांच्या अंत:करणात तुमच्या विरूद्ध द्वेष आणि वंश श्रेष्ठत्वाची भावना आहे. तेव्हाच तर ते मामुली प्रयत्नाने दुसऱ्यांदा फितन्यामध्ये (शिर्क किंवा तुमच्या विरूद्ध युद्धाला तयार झाले.) गोंवले गेले.

وَمَا كَانَ لِمُؤْمِنٍ اَنْ يَّقْتُلَ مُؤْمِنًا اِلَّا خَطَـًٔا ۚ وَمَنْ قَتَلَ مُؤْمِنًا خَطَـًٔا فَتَحْرِيْرُ رَقَبَةٍ مُّؤْمِنَةٍ وَّدِيَةٌ مُّسَلَّمَةٌ اِلٰٓى اَهْلِهٖٓ اِلَّآ اَنْ يَّصَّدَّقُوْا ۭ فَاِنْ كَانَ مِنْ قَوْمٍ عَدُوٍّ لَّكُمْ وَھُوَ مُؤْمِنٌ فَتَحْرِيْرُ رَقَبَةٍ مُّؤْمِنَةٍ ۭ وَاِنْ كَانَ مِنْ قَوْمٍۢ بَيْنَكُمْ وَبَيْنَھُمْ مِّيْثَاقٌ فَدِيَةٌ مُّسَلَّمَةٌ اِلٰٓى اَھْلِهٖ وَتَحْرِيْرُ رَقَبَةٍ مُّؤْمِنَةٍ ۚ فَمَنْ لَّمْ يَجِدْ فَصِيَامُ شَهْرَيْنِ مُتَتَابِعَيْنِ ۡ تَوْبَةً مِّنَ اللّٰهِ ۭ وَكَانَ اللّٰهُ عَلِــيْمًا حَكِــيْمًا ﴿٩٢﴾

**कोण्या विश्वासूने दुसऱ्या (मोमिन) विश्वासुला ठार करणे योग्य[१] नाही, परंतु जर चुकीने असे होऊन जाईल[२], (तर वेगळी गोष्ट आहे.) जो मनुष्य कोण्या मुसलमानाला चुकीने मारून टाकील, त्याच्यावर एका मुसलमान गुलामाला मुक्त करणे आणि मयतांच्या वारसांना द्रव्यदंड पोहचवणे आहे[३]. हां! ही वेगळी गोष्ट आहे की, ते लोक दानधर्म म्हणून (द्रव्य दंड) माफ करून टाकतील[४]. आणि जर ठार झालेला जर तुमचा शत्रू समाजातून असेल आणि तो (खुद्द) मुसलमान असेल तर फक्त एक मुसलमान गुलाम मुक्त करणे, आवश्यक राहील[५] आणि जर ठार झालेला त्या समाजापैकी असेल की तुमच्यात आणि त्यांच्यात सलोख्याचे करार बंधन असेल, तर द्रव्यदंड आवश्यक आहे. जो त्याच्या कुटुंबियांना पोहचवला जावा. आणि एक मुसलमान गुलाम पण मुक्त करणे पण आवश्यक आहे[६]. आणि ज्याला याचे सामर्थ्य नसेल, त्याच्यावर दोन महिन्यांचे लागोपाठ उपास ठेवणे आहे[७], अल्लाहतआलाकडून माफी मिळविण्यासाठी आणि अल्लाहतआला (सर्वांच्या स्थितीशी) जाणणारा आणि बुद्धीमान आहे ९२**

وَمَنْ يَّقْتُلْ مُؤْمِنًا مُّتَعَمِّدًا فَجَزَاۗؤُهٗ جَهَنَّمُ خٰلِدًا فِيْھَا وَغَضِبَ اللّٰهُ عَلَيْهِ وَلَعَنَهٗ وَاَعَدَّ لَهٗ عَذَابًا عَظِيْمًا ﴿٩٣﴾

**आणि जो कोणी कोण्या मुसलमानाला जाणून बुजून ठार करून टाकेल, तर त्याची शिक्षा नरकाग्नी आहे, ज्यांत तो नित्य राहील. त्याच्यावर अल्लाहतआलाचा गज़ब आहे[८] त्याचेवर अल्लाहतआलाचा शाप आहे आणि त्याच्यासाठी (अल्लाहतआलाने) मोठी शिक्षा तयार करून ठेवली आहे[९] ९३**

१) ही नफी नकाराच्या अर्थात आहे. जे धर्माच्या दृष्टीने हराम होण्याचे निदर्शक आहे; म्हणजे एका मुसलमानांचे दुसऱ्या मुसलमानाला ठार करणे मना आणि हराम आहे, जसे ''तुम्हास हे योग्य नाही की, तुम्ही अल्लाहच्या पैगंबरासﷺ इजा पोहचवावी'' (सू. अहज़ाब – ५३) म्हणजे निषीद्ध आहे.

२) चुकीची कारणे वेगवेगळी असू शकतात. उद्देश हा की, नियत आणि विचार ठार करण्याचा नसावा; परंतु चुकीने ठार केले जावे.

३) हा चुकीने ठार केल्याचा दंड वर्णन करण्यात येत आहे, ज्यांत दोन गोष्टी आहेत. एक प्रायश्चित्त व माफी मागणे आहे; म्हणजे मुसलमान गुलामाला मुक्त करणे, आणि दुसरी गोष्ट बंद्याचा हक्क अदा करणे आहे. आणि तो आहे प्राणमूल्य (दियत) ठार झालेल्याच्या खुनाच्या बदल्यात. ठार झालेल्याच्या वारसाला दिली जावी, ते प्राणमूल्य आहे आणि प्राणमूल्याचे स्वरूप हदीसप्रमाणे शंभर उंट किंवा त्यांची होणारी किंमत सोने,चांदी किंवा चलनाच्या स्वरूपांत असावी.

**मलहूजा** – लक्षात असू द्यावे की, जाणून बुजून ठार केल्या प्रकरणी प्राणमूल्य (किसास किंवा दियत) सख्त आहे. आणि या कडक प्राणमूल्याचे स्वरूप १०० उंट आहेत, जे वय आणि वैशिष्ट्यांच्या दृष्टीकोनातून तीन प्रकारचे किंवा तीन स्वरूपांत असतील. जेव्हा की, चुकीमुळे ठार करण्यात आलेल्या बाबतीत फक्त दियत' (प्राणमूल्य) आहे. 'किसास' (बदला) नाही. या प्राणमूल्याचे स्वरूप १०० उंट आहेत. परंतु स्वरूप एवढे कठीण नाही. याच्याशिवाय या प्राणमूल्यची किंमत सुनन अबुदाऊदच्या हदीसमध्ये ८०० दिनार किंवा ८००० दिरहम आणि तिर्मिजीच्या रिवायतीत १२००० दिनार दाखविण्यात आली आहे. अशाच प्रकारे ह.उमर رضي الله عنه नी त्यांच्या खिलाफतीच्या काळात प्राणमूल्यांच्या किंमतीत कमी जास्त निरनिराळ्या धंदेवाल्यांच्या दृष्टीकोनातून याचे वेगवेगळे मूल्ये ठरविली होती. (इर्रवाऊल गलील) ज्याचा अर्थ हा आहे की, मूळ प्राणमूल्य (१०० उंट) च्या आधारावर याची किंमत प्रत्येक काळानुसार निश्चित केली जाईल.

४) माफ करून देण्याला 'सद्का' ठरविल्याने त्याचा उद्देश माफीला प्रोत्साहन देणे आहे.

५) म्हणजे या प्रकारात दियत असणार नाही. याचे कारण काहींनी असे सांगितले आहे की, कारण की, त्याचे वारसदार युद्धातील काफिर आहेत; म्हणून ते मुसलमानाचे प्राणमूल्य घेण्याचे हक्कदार नाही. काहींनी हे कारण सांगितले की, या मुसलमानाने इस्लाम कबूल केल्यानंतर कारण की हिजरत (देशत्याग) केली नाही; जेव्हा की, हिजरतची त्यावेळी मोठी ताकीद होती. या कुचुराईमुळे त्याच्या रक्ताची किंमत कमी आहे.

६) हा एक तिसरा प्रकार आहे. यात सुद्धा तेच प्रायश्चित्त आणि प्राणमूल्य आहे; जो पहिल्या प्रकारात आहे. काहींनी म्हटले आहे की, जर ठार झालेला 'जिम्मी' (म्हणजे गैरमुस्लिम जो इस्लामी राज्यांत रहातो, व जिझीया देतो) आहे, तर त्याचे प्राणमूल्य मुसलमानाच्या प्राणमूल्याच्या अर्धे असेल. कारण की, हदीसमध्ये काफिरांचे प्राणमूल्य मुसलमानाच्या प्राणमुल्याच्या अर्धे सांगण्यात आले आहे. (इरवाऊल गलील जिल्द ४ पृष्ठ ३०) परंतु जास्त बरोबर तीच गोष्ट वाटते की, या तिसऱ्या प्रकारात सुद्धा ठार झालेल्या मुसलमानाचाच हुकूम वर्णन करण्यांत येत आहे.

७) म्हणजे जर गुलामाला मुक्त करण्याचे सामर्थ्य नसेल, तर पहिला प्रकार आणि या शेवटच्या प्रकारात प्राणमुल्याबरोबर लागोपाठ (खंडाशिवाय) दोन महिन्यांचे उपास आहेत. जर मध्येच खंड पडला, तर पुन्हा सुरवातीपासून उपास ठेवणे आवश्यक राहील. तथापि शास्त्रनिहीत कारणाने खंड पडल्याच्या प्रकारात सुरवातीपासून उपास ठेवण्याची आवश्यकता नाही. जसे मासिक पाळी, प्रसुतीनंतरचा स्त्राव किंवा मोठा आजार पण जे उपास ठेवण्याला मना करते. प्रवासाचे कारण शास्त्रविहीत होण्यांत मतभेद आहे. (इब्ने कसीर)

८) ही हेतुपुरस्सर केलेल्या खुनाची शिक्षा आहे. खुनाचे तीन प्रकार आहेत.

(अ)..चुकीने झालेला खून (ज्याचा उल्लेख या पूर्वीच्या महावाक्यांत आहे.)

(ब).. शंकास्पद इरादाने झालेला खून (जो हदीसने सिद्ध आहे.)

(क).. हेतु पुरस्सर झालेला खून ज्याचा अर्थ आहे, विचार आणि नियतने कोणाचा खून करणे आणि त्यासाठी त्या साधनाचा वापर करणे, ज्याच्याने खरोखरच सवयीने खून करणे; जसे तलवार, खंजीर वगैरे. या महावाक्यात मुसलमानांच्या खुनावर फारच कडक तंबी आणली आहे. उदाहरणार्थ याची शिक्षा नरकाग्नी आहे. ज्यात नित्य रहावे लागेल. तसेच अल्लाहचा प्रकोप आणि त्याचा शाप आणि मोठी शिक्षापण होणार. एवढ्या कठीण शिक्षा एकाच वेळी कोणत्याही गुन्ह्याच्या बाबतीत वर्णन केल्या गेल्या नाहीत. ज्यामुळे हे स्पष्ट होऊन जाते की, एका मुसलमानाचा खून करणे, अल्लाहजवळ किती मोठा अपराध आहे. हदीसमध्ये सुद्धा याची कडक निर्भत्सना आणि यावर कडक तंब्या देण्यात आलेल्या आहेत.

९) मुसलमानाच्या खुन्याची तौबा कबूल आहे की नाही? काही उलमा मजकुरीत कडक तंब्या डोळ्यापुढे ठेवून तौबा कबूल होण्याच्या पक्षात नाही. परंतु कुरआन आणि हदीसच्या काही स्पष्ट अर्थाच्या अर्थाने (नुसूस) स्पष्ट आहे की, खऱ्या अंत:करणाने केलेल्या तौबामुळे प्रत्येक गुनाह माफ होऊ शकतो. ''पण ज्याने पश्चात्ताप व्यक्त केला आणि ईमान आणले, आणि चांगली कामे केली.'' (सू. फूर्कान ७०) आणि दुसरी तौबाची महावाक्ये सर्वांना ठाऊक आहे. प्रत्येक गुनाह मग तो लहान असो वा मोठा वा फार मोठा. खऱ्या अंत:करणाने केलेल्या तौबाने त्याची माफी शक्य आहे. येथे त्याची शिक्षा नरकाग्नी जी वर्णन करण्यात आली आहे, याचा अर्थ आहे की, जर त्याने तौबा केली नाही, तर त्याची ही शिक्षा आहे; जी अल्लाहतआला या अपराधावर त्याला देऊ शकतो. अशाच प्रकारे तौबा न करण्याच्या प्रकारात खुलूद (नित्य नरकाग्नीत रहाणे) चा अर्थ पण दिर्घ मुदत आहे. कारण की, नरकाग्नीत नित्य राहणे काफिर आणि मुशरीकांसाठीच आहे. याशिवाय खुनाचा संबंध जरी सेवकांच्या हक्काशी आहे, जे तौबाने पण टाळता येत नाही; परंतु अल्लाहतआला आपल्या कृपेनेच दयेने पण याची भरपाई आणि निरसन करूशकतो. अशाप्रकारे ज्याचा खून झालेला आहे, त्यालापण बदला मिळतो आणि खुन्याला पण माफी मिळून जाईल (फत्हुल कदीर व इब्ने कसीर)

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوۡۤا اِذَا ضَرَبۡتُمۡ فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ فَتَبَيَّنُوۡا وَلَا تَقُوۡلُوۡا لِمَنۡ اَلۡقٰٓى اِلَيۡكُمُ السَّلٰمَ لَسۡتَ مُؤۡمِنًا ۚ تَبۡتَغُوۡنَ عَرَضَ الۡحَيٰوةِ الدُّنۡيَا فَعِنۡدَ اللّٰهِ مَغَانِمُ كَثِيۡرَةٌ ‌ؕ كَذٰلِكَ كُنۡتُمۡ مِّنۡ قَبۡلُ فَمَنَّ اللّٰهُ عَلَيۡكُمۡ فَتَبَيَّنُوۡا ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ بِمَا تَعۡمَلُوۡنَ خَبِيۡرًا ۝٩٤

**हे ईमानवाल्यांनो! जेव्हा तुम्ही अल्लाहच्या मार्गात जात आहात, तर चौकशी करून घेत चला आणि जो तुम्हास 'सलाम अलैकुम' करेल, त्याला असे म्हणू नका की तू ईमानवाला नाहीस[१]. तुम्ही ऐहिक जीवनाच्या सामग्रीच्या शोधात आहात, तर अल्लाहतआला जवळ पुष्कळ नेअमते आहेत[२]; पूर्वी तुम्ही सुद्धा असेच होता; मग अल्लाहतआलाने तुमच्यावर उपकार केला. म्हणून तुम्ही जरूर चौकशी व शाहनिशा करून घेत चला. नि:संशय अल्लाहतआला तुमच्या कर्मांबद्दल माहितगार आहे९४**

لَا يَسۡتَوِى الۡقٰعِدُوۡنَ مِنَ الۡمُؤۡمِنِيۡنَ غَيۡرُ اُولِى الضَّرَرِ وَالۡمُجٰهِدُوۡنَ فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ بِاَمۡوَالِهِمۡ وَاَنۡفُسِهِمۡ‌ ؕ فَضَّلَ اللّٰهُ الۡمُجٰهِدِيۡنَ بِاَمۡوَالِهِمۡ وَاَنۡفُسِهِمۡ عَلَى الۡقٰعِدِيۡنَ دَرَجَةً ‌ؕ وَكُلًّا وَّعَدَ اللّٰهُ الۡحُسۡنٰى‌ ؕ وَفَضَّلَ اللّٰهُ الۡمُجٰهِدِيۡنَ عَلَى الۡقٰعِدِيۡنَ اَجۡرًا عَظِيۡمًا ۝٩٥

**आपल्या जीवांनी आणि धनाने अल्लाहच्या मार्गात जिहाद करणारे मुसलमान आणि (कुठल्याही) कारणाशिवाय बसून राहणारे मुसलमान हे (दोन्ही) समान नाहीत[३]; आपल्या तन मन धनाने, जिहाद करणाऱ्यांना बसून रहाणाऱ्यांवर अल्लाहतआलाने दर्जात मोठे श्रेष्ठत्व देऊन ठेवले आहे आणि असा तर अल्लाहतआलाने प्रत्येकाला चांगल्या मोबदल्याचा वायदा देऊन ठेवला आहे[४]. परंतु युद्ध करणाऱ्यांना बसून रहाणाऱ्यांवर फार मोठ्या मोबदल्याचे श्रेष्ठत्व देऊन ठेवले आहे९५**

१) हदीसमध्ये येते की, काही सहाबा ﵃ कोण्या इलाख्यातून जात होते. जेथे एक गुराखी बकऱ्या चारत होता. मुसलमानांना बघून गुराख्याने त्यांना सलाम केला. काही सहाबा ﵃ असे समजले की, तो कदाचित् आपला जीव वाचविण्यासाठी आपल्याला मुसलमान जाहीर करीत आहे. म्हणून त्यांनी कोणतीही चौकशी केल्याशिवाय त्याचा खून करून टाकला आणि बकऱ्या (गनिमतचा माल म्हणून) घेऊन हुजूर ﷺ च्या सेवेत हजर झाले. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (स.बुखारी तिर्मिझी, तफसीर सू.निसा) काही उल्लेखांत असे येते की, नबी ﷺ नी असेपण म्हटले की, मक्केमध्ये पूर्वी तुम्ही सुद्धा या गुराख्याप्रमाणे ईमान लपविण्याला बाध्य होता. (स.बुखारी किताबुल दयात) अर्थात हा खून करणे योग्य नव्हते.

२) म्हणजे तुम्हाला काही बकऱ्या या ठार झालेल्या माणसाकडून मिळून गेल्या हे काहीच नाही. अल्लाहजवळ यापेक्षा किती तर उत्कृष्ठ गनीमता आहेत. ज्या अल्लाह रसूलच्या आज्ञापालनामुळे तुम्हाला या जगात सुद्धा मिळू शकतात. आणि परलोकांत तर यांचे मिळणे खात्रीपूर्वकच आहे.

३) जेव्हा हे महावाक्य अवतरीत झाले की, अल्लाहच्या मार्गात जिहाद करणारे आणि घरात बसून राहणारे, एक समान नाहीत. तेव्हा ह. अब्दुल्लाह बिन उम्मेमकतुम (अंध सहाबी) ﵁ वगैरे नी विनंती केली आम्ही तर अपंग आहोत; म्हणून आम्ही जिहादमध्ये भाग घेण्यापासून वंचित आहोत. अर्थ असा होता की, घरात बसून राहिल्या कारणाने 'जिहाद' मध्ये भाग घेणाऱ्याच्या बरोबर पुण्य आणि प्रतिफळ प्राप्त करू शकणार नाही; वास्तविक पाहतां. आमचे घरांत बसून रहाणे आवड किंवा जीवाच्या संरक्षणासाठी नाही; परंतु शास्त्रसंमत सबबीमुळे आहे. त्यावर अल्लाहतआलाने 'काही कारणाशिवाय' त्यांना वगळून दिले; म्हणजे काही कारणाशिवाय बसून राहणारे, जिहाद करणाऱ्यांच्या बरोबरीत नाही. ज्याचा अर्थ हा झाला शास्त्रसंमत सबबीमुळे बसून राहणारे आपल्या नियत (दिली इरादा) मुळे प्रतिफळांत 'जिहाद' मध्ये भाग घेणाऱ्यांच्या बरोबर होऊ शकतात. जसे की हदीसमध्ये सुद्धा येते की, मदीनेमध्ये बसून राहणारे अपंग जिहादमध्ये भाग घेणाऱ्यांच्या बरोबर प्रतिफळांत सहभागी आहे; कारण की, त्यांना सबबीमुळे थांबावे लागले आहे. (स.बुखारी किताबुल जिहाद)

४) म्हणजे तन मन धनाने जिहाद करणाऱ्यांना जे श्रेष्ठत्व प्राप्त होईल, जिहादमध्ये भाग न घेणारे जरी यापासून वंचित होतील, तरीसुद्धा अल्लाहतआलाने दोघांबरोबर भलाईचा वायदा केला आहे. याने धर्मपंडितांनी (उलमांनी) आधार घेतला आहे की, सर्व साधारण परिस्थिती जिहाद 'फर्ज ऐन' नाही 'फर्ज किफाया' आहे, म्हणजे जरूरीप्रमाणे मनुष्य जिहादमध्ये भाग घेऊन तर त्या इलाख्याच्या दुसऱ्या लोकांकडून सुद्धा हे फर्ज अदा केले गेले असे समजण्यात येईल.

دَرَجٰتٍ مِّنۡهُ وَمَغۡفِرَةً وَّرَحۡمَةً ؕ وَكَانَ اللّٰهُ غَفُوۡرًا رَّحِيۡمًا ﴿٩٦﴾

आपल्याकडून मर्तब्याची पण आणि माफीची पण आणि सुख समाधानाचीपण, आणि अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ९६

اِنَّ الَّذِيۡنَ تَوَفّٰٮهُمُ الۡمَلٰٓـئِكَةُ ظَالِمِىۡۤ اَنۡفُسِهِمۡ قَالُوۡا فِيۡمَ كُنۡتُمۡ‌ ؕ قَالُوۡا كُنَّا مُسۡتَضۡعَفِيۡنَ فِى الۡاَرۡضِ‌ ؕ قَالُوۡۤا اَلَمۡ تَكُنۡ اَرۡضُ اللّٰهِ وَاسِعَةً فَتُهَاجِرُوۡا فِيۡهَا‌ ؕ فَاُولٰٓـئِكَ مَاۡوٰٮهُمۡ جَهَـنَّمُ‌ ؕ وَسَآءَتۡ مَصِيۡرًا ۙ ﴿٩٧﴾

जे लोक आपल्या जिवावर जुलूम करतात, जेव्हा देवदूत त्यांचे प्राण हरण करतात, तेव्हा विचारतात की, तुम्ही कुठल्या स्थितीत होता?[१] ते उत्तर देतात की, आम्ही आपल्या जागी दुर्बल आणि पराधीन होतो[२]; देवदूत म्हणतात की, काय अल्लाहतआलाची जमीन विस्तीर्ण नव्हती की, तुम्ही हिजरत (देशत्याग) करून गेले असते? हेच लोक आहेत, ज्यांचे ठिकाण नरकाग्नी आहे आणि ती पोहोचण्याची (फारच) वाईट जागा आहे ९७

اِلَّا الۡمُسۡتَضۡعَفِيۡنَ مِنَ الرِّجَالِ وَالنِّسَآءِ وَالۡوِلۡدَانِ لَا يَسۡتَطِيۡعُوۡنَ حِيۡلَةً وَّلَا يَهۡتَدُوۡنَ سَبِيۡلًا ۙ ﴿٩٨﴾

परंतु जे पुरूष, स्त्रिया आणि मुले लाचार आहेत, ज्यांना ना कुठली काही करण्याची शक्ती न कुठल्या रस्त्याचे ज्ञान आहे[३] ९८

فَاُولٰٓـئِكَ عَسَى اللّٰهُ اَنۡ يَّعۡفُوَ عَنۡهُمۡ‌ ؕ وَكَانَ اللّٰهُ عَفُوًّا غَفُوۡرًا ﴿٩٩﴾

फार शक्यता आहे की, अल्लाहतआला त्यांना क्षमा करेन. अल्लाहतआला माफीकर्ता आणि क्षमाशिल आहे ९९

وَمَنۡ يُّهَاجِرۡ فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ يَجِدۡ فِى الۡاَرۡضِ مُرٰغَمًا كَثِيۡرًا وَّسَعَةً‌ ؕ وَمَنۡ يَّخۡرُجۡ مِنۡۢ بَيۡتِهٖ مُهَاجِرًا اِلَى اللّٰهِ وَرَسُوۡلِهٖ ثُمَّ يُدۡرِكۡهُ الۡمَوۡتُ فَقَدۡ وَقَعَ اَجۡرُهٗ عَلَى اللّٰهِ‌ ؕ وَكَانَ اللّٰهُ غَفُوۡرًا رَّحِيۡمًا ﴿١٠٠﴾

आणि जो कोणी अल्लाहच्या मार्गात स्वदेश त्याग करील, तो पृथ्वीवर बरीचशी वस्ती करण्याची जागा पण पावेल आणि रेलचेल सुद्धा[४] आणि जो कोणी आपल्या घरातून अल्लाहतआला आणि त्याच्या रसूल (सल्ल.) कडे निघाला; मग त्याला मृत्यूने येऊन गाठले तरी सुद्धा खचितच् त्याचे प्रतिफळ अल्लाहतआलावर सिद्ध होऊन गेले[५]; आणि अल्लाहतआला मोठाच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे १००

وَاِذَا ضَرَبۡتُمۡ فِى الۡاَرۡضِ فَلَيۡسَ عَلَيۡكُمۡ جُنَاحٌ اَنۡ تَقۡصُرُوۡا مِنَ الصَّلٰوةِ ‌ۖ اِنۡ خِفۡتُمۡ اَنۡ يَّفۡتِنَكُمُ الَّذِيۡنَ كَفَرُوۡا‌ ؕ اِنَّ الۡـكٰفِرِيۡنَ كَانُوۡا لَـكُمۡ عَدُوًّا مُّبِيۡنًا ﴿١٠١﴾

जेव्हा तुम्ही प्रवासात जात असाल तेव्हा तुमच्यावर नमाजीत कमी (कसर) करण्यात कुठलेच पाप नाही. जर तुम्हास भीती असेल की, काफीर तुम्हास सतावतील[६]; खचितच् काफिर तुमचे उघड शत्रू आहेत १०१

१) हे महावाक्य त्या लोकांच्या बाबतीत अवतीर्ण झाले आहे, जे मक्का आणि त्याच्या आजूबाजूच्या परिसरांत मुसलमान तर होऊन चुकले होते. परंतु त्यांनी आपल्या वाडवडीलांच्या इलाख्यांना आणि घराण्याला सोडून हिजरत करण्यापासून पळ काढला. जेव्हा की मुसलमानांच्या सामर्थ्याला एका ठिकाणी एकवटण्यासाठी हिजरत करण्याचा फारच ताकीदी हुकूम दिला जाऊन चूकला होता; म्हणून ज्या लोकांनी हिजरतच्या हुकूमावर अंमलबजावणी केली नाही. त्यांना येथे 'जालीम' ठरविण्यात आले आहे आणि त्यांचे ठिकाण 'जहन्नम' दाखविण्यात आले आहे. ज्यामुळे एकतर हे ठाऊक झाले की, परिस्थीती आणि मागणीप्रमाणे इस्लामचे काही आदेश (जर पालन केले नाहीतर) कुफ्र किंवा इस्लामच्या सारखे होऊन जातात. जसे याप्रसंगी हिजरत, इस्लाम आणि त्यापासून पळ काढणे इस्लामच्या विरूद्ध ठरवण्यात आले. दुसरे हे ठाऊक झाले की, अशा कुफ्रच्या ठिकाणापासून हिजरत करणे फर्ज आहे. जेथे इस्लामच्या शिक्षणावर अंमलबजावणी करणे कठीण आहे आणि तेथे रहाणे कुफ्र आणि कुफ्रवाल्यांचे उत्साहीत होण्याला कारणीभूत होईल.

२) याठिकाणी जमीन (जागेने) अभिप्रेत, अवतीर्ण होण्याच्या कारणाच्या दृष्टीकोनातून मक्का आणि त्याच्या आजूबाजूचा परिसर आहे. आणि पुढे अल्लाहच्या जमिनीने अभिप्रेत मदीना आहे. परंतु आदेशाच्या दृष्टीकोनातून सार्वत्रिक आहे; म्हणजे पहिल्या जागेने अभिप्रेत काफिरांची जागा होईल जेथे इस्लामवर अंमलबजावणी कठीण आहे आणि अल्लाहच्या जमिनीने प्रत्येक ती जागा अभिप्रेत होईल, जेथे मनुष्य अल्लाहच्या धर्मावर

अंमलबजावणी करण्याच्या गरजेमुळे हिजरत करून जाईल.
३) हा त्या पुरूषांना, स्त्रियांना आणि बालकांना हिजरत करण्यापासून वगळण्याचा आदेश आहे, जे याच्या साधनांनी वंचित आणि रस्त्याविषयी देखील अनभिज्ञ होते. मुले जरी धार्मिक आदेशांवर अंमल करण्यास पात्र नसतील; परंतु येथे त्यांचा उल्लेख हिजरतच्या महत्त्वाला स्पष्ट करण्यासाठी केला गेला आहे, की मुलांनी सुद्धा हिजरत करावी, किंवा मग येथे बालकांनी अभिप्रेत नुकत्याच तारूण्यात पदार्पण करणारी मुले असावी.
४) यात हिजरतला प्रोत्साहन आणि मुशरिकांपासून वेगळे होण्याची सूचना आहे. 'मुरागमन्' चा अर्थ जागा, ठिकाण, मुक्काम अथवा आश्रयस्थान आहे आणि 'सअतन्' ने रोजी किंवा जागा आणि मुक्काम स्थळाची विस्तीर्णता आणि विपुलता अभिप्रेत आहे.
५) यात नियतप्रमाणे पुण्य आणि प्रतिफल मिळण्याची हामी आणि खात्री आहे. मग जरी मृत्यूच्या कारणाने तो या कर्माला परिपूर्ण करण्यास असमर्थ राहिला असेल. जसा की मागे होऊन गेलेल्या उम्मतीमध्ये १०० खून करणाऱ्याची घटना हदीसमध्ये वर्णन केली गेली आहे, जो तौबा करण्यासाठी पुण्यवानांच्या एका वस्तीत जात होता, तर रस्त्यात मृत्यू येऊन ठेपला. अल्लाहतआलाने पुण्यवानांच्या वस्तीला दुसऱ्या वस्तीच्या मानाने जवळ करून दिले. ज्यामुळे दयेचे देवदूत त्याला आपल्या बरोबर घेऊन गेले. (स.बुखारी व मुस्लीम) अशाच प्रकारे जो मनुष्य हिजरतच्या नियतने घरातून निघेल, परंतु रस्त्यातच त्याचा मृत्यू होऊन जाईल, तर त्याला अल्लाहतआला कडून हिजरतचे पुण्य जरूर मिळेल, जरी तो हिजरतच्या कर्माला पूर्ण करण्याला पण पोहचला नसेल. जसे हदीसमध्ये सुद्धा आहे, नबी करीम ﷺ नी फरमाविले,''कर्मांची फलश्रृती नियतीवर आहे.'' ''मनुष्यासाठी तेच आहे, ज्याची त्याने नियत केली.'' ज्याने अल्लाह आणि त्याच्या रसूल ﷺ साठी हिजरत केली, बस मग त्याची हिजरत त्यांच्यासाठी आहे. आणि ज्याने ऐहिक ऐश्वर्य (दुनिया) प्राप्त करण्यासाठी किंवा कोण्या स्त्रीबरोबर लग्न करण्याच्या नियतीने हिजरत केली, बस त्याची हिजरत त्याचसाठी आहे, ज्या नियतीने त्याने हिजरत केली (स.बुखारी व मुस्लीम) हा सार्वत्रिक आदेश आहे. जो धर्माच्या प्रत्येक कामाला शामिल आहे. म्हणजे याला करतांना अल्लाहची प्रसन्नता दृष्टीसमोर असावी, तर तो कबूल, नाहीतर धुत्कारलेला असेल.
६) यात प्रवासाच्या स्थितीत नमाजित कमी करण्याची (कसर अदा करण्याची) परवानगी देण्यात येत आहे. 'इन्‌खिफतून' (जर तुम्हास भय असेल.....) वर्चस्व प्राप्त केलेल्या स्थितीच्या अनुषंगाने आहे. कारण की, यावेळी पूर्व अरबस्थान दारूल हरब (म्हणजे गैरमुस्लीमांचे वस्तीस्थान ज्यांत मुस्लीमांना त्यांची धार्मिक कर्तव्ये पार पाडण्यात अडचणी येतात) होऊन गेला होता. कुठल्याही प्रकारचा प्रवास कुठल्याही प्रकारच्या धोक्यांनी मुक्त नव्हता. म्हणजे ही अट नाही की, प्रवासांत भीती असेल तरच कसरची (नमाजीमध्ये कमी करणे) परवानगी आहे. जसे कुरआन मजीदमध्ये, आणखीही काही ठिकाणी अशाप्रकारच्या अटी वर्णन करण्यात आल्या आहेत. ज्या योगायोगाने ज्या वर्चस्व प्राप्त केलेल्या स्थितीनुसार आहेत. उदाहरणार्थ,''वाढवून चढवून (चक्रवाढ) व्याज खाऊ नका.'' (सू. आले इमरान-१३०) ''तुम्ही आपल्या दासींना वाईट काम करण्याला भाग पाडू नका; जर त्या त्यांपासून वाचू इच्छितील'' (सू. नूर-३३) कारण त्या वाचू इच्छित होत्या, म्हणून अल्लाहने त्यांचे वर्णन करून दिले. असे नाही की, जर त्या वाईट काम करण्याला तयार असतील तर तुमच्यासाठी हे योग्य आहे की, तुम्ही त्यांच्याकडून वाईटकाम करून घेत चला.'' आणि तुमच्या पालन पोषणात असलेल्या मुली ज्या तुमच्या कुशीत आहेत तुमच्या स्त्रियांकडून'' (सू. निसा-२३) वगैरिहा मिनल आयात. काही सहाबाच्या ؓ डोक्यात अशी शंका आली की, आता तर शांती आहे; आम्हाला प्रवासांत नमाजीत कसर करावयास नको. नबी ﷺ नी म्हटले, ''हा अल्लाहकडून तुमच्यासाठी सदका (दानधर्म) आहे; त्याच्या सदक्याला कबूल करा.'' (स.मुस्लीम, मुसनद अहमद)
**मलहुजा** :- प्रवासाचे अंतर आणि दिवस यांच्या बाबतीत पुष्कळच मतभेद आहेत. ईमाम शौकानीने तीन फरसख म्हणजे ९ कोसवाल्या रिवायतीला प्राधान्य दिले आहे. (नैलूल अवतार जिलद ३ पृ.२२०) याचप्रमाणे पुष्कळसे अहलेहदीस उलमा, या गोष्टीला आवश्यक ठरवतात की, प्रवासामध्ये कोण्या एका जागी, तीन किंवा चार दिवसांपेक्षा जास्त मुक्काम करण्याची नियत असेल, तर नमाज कसर करण्याची परवानगी नाही. (तपशीलासाठी कृपया पहावे, 'मिरआतुल मफातीह.'')

وَإِذَا كُنتَ فِيهِمْ فَأَقَمْتَ لَهُمُ الصَّلَوٰةَ فَلْتَقُمْ
طَآئِفَةٌ مِّنْهُم مَّعَكَ وَلْيَأْخُذُوٓا أَسْلِحَتَهُمْ فَإِذَا
سَجَدُوا فَلْيَكُونُوا مِن وَرَآئِكُمْ وَلْتَأْتِ طَآئِفَةٌ
أُخْرَىٰ لَمْ يُصَلُّوا فَلْيُصَلُّوا مَعَكَ وَلْيَأْخُذُوا
حِذْرَهُمْ وَأَسْلِحَتَهُمْ وَدَّ الَّذِينَ كَفَرُوا لَوْ تَغْفُلُونَ
عَنْ أَسْلِحَتِكُمْ وَأَمْتِعَتِكُمْ فَيَمِيلُونَ عَلَيْكُم
مَّيْلَةً وَاحِدَةً وَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ إِن كَانَ بِكُمْ
أَذًى مِّن مَّطَرٍ أَوْ كُنتُم مَّرْضَىٰٓ أَن تَضَعُوٓا أَسْلِحَتَكُمْ
وَخُذُوا حِذْرَكُمْ إِنَّ اللَّهَ أَعَدَّ لِلْكَٰفِرِينَ عَذَابًا
مُّهِينًا ﴿١٠٢﴾

**आणि जेव्हा तुम्ही त्यांच्यात असाल, आणि त्यांच्यासाठी नमाज उभी कराल, तर पाहिजे की, त्यांचा एक समूह आपल्याबरोबर आपली शस्त्रे घेऊन उभा रहावा; मग जेव्हा ते सजदा करून चुकतील; तर ते (तेथून) सरकून आपल्या मागे येऊन जातील; आणि तो दुसरा समूह ज्याने नमाज पढली नाही, तो येऊन जावा आणि आपल्या बरोबर नमाज अदा करावी आणि आपले संरक्षण आणि आपली शस्त्रे घेऊन असावे. काफिर (असे) इच्छितात की, कुठल्याही प्रकारे तुम्ही आपल्या शस्त्रांकडून आणि आपल्या सामानाकडून गाफील होऊन जावे, तर त्यांनी अचानक तुमच्यावर धांवा बोलून द्यावा[१]; हां! आपली हत्यारे उतरवून ठेवण्यात, त्यावेळी तुमच्यावर काही गुनाह नाही, जेव्हा की तुम्हास (काही) त्रास असेल, किंवा पावसाच्या कारणाने, किंवा आजारी होऊन जाण्याने, आणि आपल्या बचावाच्या वस्तूसोबत घेऊन रहा; खचितच् अल्लाहतआलाने नाकारणाऱ्यांसाठी फजितीचा मार तयार करून ठेवला आहे ﴿١٠٢﴾**

فَإِذَا قَضَيْتُمُ الصَّلَوٰةَ فَاذْكُرُوا اللَّهَ قِيَٰمًا وَقُعُودًا
وَعَلَىٰ جُنُوبِكُمْ فَإِذَا اطْمَأْنَنتُمْ فَأَقِيمُوا الصَّلَوٰةَ
إِنَّ الصَّلَوٰةَ كَانَتْ عَلَى الْمُؤْمِنِينَ كِتَٰبًا مَّوْقُوتًا ﴿١٠٣﴾

**मग जेव्हा तुम्ही नमाज अदा करून चुकाल, तर उठताना बसताना आणि झोपतांना अल्लाहतआलाचे नामस्मरण करीत रहा[२]; आणि जेव्हा (शत्रूकडून) समाधानांत रहाल तेव्हा नमाज कायम करा[३]. खचितच् नमाज ईमानवाल्यांवर ठराविक वेळेवर फर्ज आहे[४] ﴿١٠٣﴾**

१) या महावाक्यात 'भीतीच्या नमाजी' ची परवानगी किंबहुना हुकूम देण्यात येत आहे. 'सलातुल खौफ' चा अर्थ आहे भीतीची नमाज. ही त्यावेळी लागू होते; जेव्हा मुसलमान आणि काफिरांच्या फौजा, एक दुसऱ्याच्या विरोधात युद्धासाठी तयार उभ्या असतील. आणि एका क्षणाचे पण दुर्लक्ष मुसलमानांसाठी फारच खतरनाक सिद्ध होऊ शकत असेल. अशा परिस्थीतीत जर नमाजीची वेळ होऊन जाईल, तर 'सलातूल खौफ' पढण्याचा हुकूम आहे. ज्याचे वेगवेगळे प्रकार हदीसमध्ये वर्णन करण्यात आले आहे. उदा.सेना दोन गटांत विभागली गेली. एक गट शत्रूच्या मुकाबल्यात उभा राहीला की, काफिरांची हल्ला करण्याची हिंमत होणार नाही आणि एका गटाने येऊन नबी ﷺ च्या मागे नमाज पढली. जेव्हा हा गट नमाज पढून मोकळा झाला तर पहिल्या ठिकाणी त्याने मोर्चा बांधला. आणि मोर्चा बांधलेला गट नमाजीसाठी येऊन पोहचला. काही रिवायतमध्ये येते की, आपण ﷺ नी दोन्ही गटांना एकेक रकआत नमाज़ पढविली. अशा प्रकारे आपली ﷺ ची दोन रकआत आणि बाकी सैनिकांची एक एक रकात झाली. काही रिवायती मध्ये येते की, दोन दोन रकआत पढविल्या. अशा प्रकारे आपण ﷺ च्या चार रकआती आणि सैनिकांची दोन दोन रकआती झाल्या आणि काहींमध्ये येते की, एक रकआत पढून अत्तहियात सारखे बसून राहिले, सैनिकांनी उभे राहून आपल्याकडून एक रकआत पढून, दोन रकआती पुऱ्या केल्या आणि शत्रुसमोर जाऊन उभे ठाकले. दुसऱ्या गटाने येऊन नबी ﷺ च्या मागे नमाज पढली. आपण ﷺ नी त्यांनापण एक रकआत पढविली आणि अत्तहियात मध्ये बसून गेले आणि त्या वेळेपर्यंत बसून राहिले की, जोपर्यंत सैनिकांनी दुसरी रकआत पुरी करून घेतली नाही. मग त्यांच्या बरोबर आपण ﷺ नी सलाम फेरून दिला. अशाप्रकारे आपली ﷺ पण दोन रकआत आणि सैनिकांच्या दोन्ही गटांची पण दोन दोन रकआती झाल्या. (हदीसींची पुस्तके पहावी.)

२) अभिप्रेत हीच 'भीतीची नमाज' आहे. हिच्यात कारण की, कमी करून देण्यात आली आहे. म्हणून त्याच्या भरपाईसाठी सांगण्यात येत आहे की, उभे बसलेले किंवा झोपलेले असतांना अल्लाहचे स्मरण करीत रहा.

३) याच्याने अभिप्रेत आहे की, जेव्हा भीती आणि युद्धाची स्थिती संपून जाईन तेव्हा मग नमाजीला त्या पद्धतीने पढावयाचे आहे, जी सर्व साधारण परिस्थीतीत पढली जाते.

४) यांत नमाजीला ठरलेल्यावेळी पढावयाची ताकीद आहे. ज्याने ठाऊक होते शास्त्रसंमत सबबीशिवाय दोन नमाजींना एकत्र करणे बरोबर नाही.कारण की, याप्रमाणे कमीत कमी एक नमाज वेळ सोडून पढली जाईल. जे या महावाक्याच्या विरूद्ध आहे.

ع ١٥ ٤ ١٢

وَلَا تَهِنُوْا فِي ابْتِغَآءِ الْقَوْمِ ؕ اِنْ تَكُوْنُوْا تَاْلَمُوْنَ فَاِنَّهُمْ يَاْلَمُوْنَ كَمَا تَاْلَمُوْنَ ۚ وَتَرْجُوْنَ مِنَ اللّٰهِ مَا لَا يَرْجُوْنَ ؕ وَكَانَ اللّٰهُ عَلِيْمًا حَكِيْمًا ﴿١٠٤﴾

१५ ४ १२

या लोकांचा पाठलाग करण्यात तुम्ही हिंमत खचू देऊ नका(१), जर तुम्हाला कष्ट पोहोचतात; तर त्यांनापण तुमच्याप्रमाणे कष्ट पोहोचतात आणि तुम्ही अल्लाहतआलाकडून त्या अपेक्षा बाळगून आहात, ज्या अपेक्षा त्यांना नाही(२). आणि अल्लाहतआला ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. ﴿१०४﴾

اِنَّآ اَنْزَلْنَآ اِلَيْكَ الْكِتٰبَ بِالْحَقِّ لِتَحْكُمَ بَيْنَ النَّاسِ بِمَآ اَرٰىكَ اللّٰهُ ؕ وَلَا تَكُنْ لِّلْخَآئِنِيْنَ خَصِيْمًا ﴿١٠٥﴾

खरोखरच आम्ही तुमच्याकडे सत्यासह आपले पुस्तक अवतरीत केलेले आहे; कारण तुम्ही लोकांत त्याच्याप्रमाणे निवाडा करावा, जसे अल्लाहतआलाने तुम्हास दाखवून दिले आहे(३) आणि दगलबाजांचे(४) तरफदार बनू नका ﴿१०५﴾

وَّاسْتَغْفِرِ اللّٰهَ ؕ اِنَّ اللّٰهَ كَانَ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿١٠٦﴾

आणि अल्लाहतआलाजवळ माफी मागा(५); नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ﴿१०६﴾

وَلَا تُجَادِلْ عَنِ الَّذِيْنَ يَخْتَانُوْنَ اَنْفُسَهُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يُحِبُّ مَنْ كَانَ خَوَّانًا اَثِيْمًا ﴿١٠٧﴾

आणि अशा लोकांची कड घेऊन लोकांशी झगडू नका, जे आपल्याशीच दगलबाजी करतात; खचितच् दगलबाज पापीला अल्लाहतआला पसंत करीत नाही ﴿१०७﴾

يَّسْتَخْفُوْنَ مِنَ النَّاسِ وَلَا يَسْتَخْفُوْنَ مِنَ اللّٰهِ وَهُوَ مَعَهُمْ اِذْ يُبَيِّتُوْنَ مَا لَا يَرْضٰى مِنَ الْقَوْلِ ؕ وَكَانَ اللّٰهُ بِمَا يَعْمَلُوْنَ مُحِيْطًا ﴿١٠٨﴾

ते लोकांपासून तर लपून जातात; (परंतु) अल्लाहतआला पासून लपू शकत नाहीत. ते, रात्रीच्यावेळी जेव्हा की, अल्लाहच्या नावडत्या गोष्टीची गुप्त खलबते करतात; त्यावेळी सुद्धा अल्लाह त्यांचे जवळ असतो; त्यांच्या सर्व कर्मांना तो घेरून आहे ﴿१०८﴾

هٰاَنْتُمْ هٰۤؤُلَآءِ جٰدَلْتُمْ عَنْهُمْ فِي الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۫ فَمَنْ يُّجَادِلُ اللّٰهَ عَنْهُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ اَمْ مَّنْ يَّكُوْنُ عَلَيْهِمْ وَكِيْلًا ﴿١٠٩﴾

हां! तर हे आहांत तुम्ही लोक, की जगात तुम्ही त्यांची तरफदारी केली; परंतु अल्लाहतआला समोर कयामतच्या दिवशी, त्यांची तरफदारी कोण करणार, आणि तो कोण आहे, जो त्यांचा वकील बनून उभा राहू शकेल?(६) ﴿१०९﴾

وَمَنْ يَّعْمَلْ سُوْٓءًا اَوْ يَظْلِمْ نَفْسَهٗ ثُمَّ يَسْتَغْفِرِ اللّٰهَ يَجِدِ اللّٰهَ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿١١٠﴾

आणि जो मनुष्य काही वाईट कर्म करेल, किंवा आपल्या जिवावर जुलूम करेल आणि मग अल्लाहतआला जवळ माफी मागेल; तर तो अल्लाहत- आलाला क्षमाकर्ता आणि दयाळू पावेल ﴿११०﴾

وَمَنْ يَّكْسِبْ اِثْمًا فَاِنَّمَا يَكْسِبُهٗ عَلٰى نَفْسِهٖ ؕ وَكَانَ اللّٰهُ عَلِيْمًا حَكِيْمًا ﴿١١١﴾

आणि जो गुनाह करतो, त्याचे ओझे त्याच्यावरच आहे(७). आणि अल्लाहतर सर्व काही जाणतो आणि पूर्ण युक्तीसंपन्न आहे ﴿१११﴾

ع ١٦ ٨ ١٣

وَمَنْ يَّكْسِبْ خَطِيْٓئَةً اَوْ اِثْمًا ثُمَّ يَرْمِ بِهٖ بَرِيْٓئًا فَقَدِ احْتَمَلَ بُهْتَانًا وَّاِثْمًا مُّبِيْنًا ﴿١١٢﴾

१६ ८ १३

आणि जो मनुष्य कोणी गुनाह किंवा चुका करून, ज्याने गुनाह केला नाही, त्याचेवर थोपून देईन तर त्याने फार मोठा आळ घेतला आणि हा खुल्लम खुल्ला गुनाह केला(८) ﴿११२﴾

१) म्हणजे आपल्या शत्रूचा पाठलाग करण्यात दौर्बल्य दाखवू नका; किंबहुना त्यांच्या विरूद्ध भरपूर प्रयत्नांची पराकाष्ठा करा आणि घात लाऊन बसा.

२) म्हणजे जखमा तर तुम्हाला सुद्धा आणि त्यांना सुद्धा दोघांना झाल्या आहेत, परंतु या जखमांवर तर तुम्हाला अल्लाहकडून प्रतिफलाची आशा आहे. परंतु तो याची आशा बाळगत नाही, म्हणून परलोकातील प्रतिफलासाठी जे श्रम आणि प्रयत्न तुम्ही करू शकतात, ते काफिर करू शकत नाही.

३) या महावाक्यांच्या (आ.१०४ ते ११३) अवतरणाच्या कारणांत दाखविण्यात आले आहे की, अन्सारच्या बनी जुफर घराण्यात एक मनुष्य ताअमा किंवा बशीर बिन अुबैरिकने एका अन्साऱ्याचे चिलखत चोरून घेतले. जेव्हा याची

चर्चा झाली आणि त्याला आपली चोरी उघडकीस येण्याच्या धोक्याची जाणीव झाली; तेव्हा त्याने ते चिलखत एका यहूद्याच्या घरांत फेकून दिले. आणि बनी जुफरच्या काही माणसांना बरोबर घेऊन नबी ﷺ च्या सेवेत हजर झाला. त्या सर्वांनी सांगितले की, चिलखत चोरणारा तो अमुक यहूदी आहे. यहूदी नबी ﷺ च्या सेवेत हजर झाला आणि सांगितले की, बनी उबैरिकने चिलखत चोरी करून माझ्या घरांत फेकून दिले आहे. बनी जुफर व बनी उबैरिक (ताअमा आणि बशीर वगैरे) हुशार होते आणि नबी ﷺ ला हेच सांगत राहिले की, चोर यहूदीच आहे आणि तो ताअमावर आळ घेण्यात खोटारडा आहे. नबी ﷺ पण त्याच्या चिकन्या चोपड्या गोष्टींनी प्रभावित होऊन गेलेत. आणि शक्यता होती की, त्या अन्सारीला चोरीच्या आरोपातून मुक्त करून यहूद्यांवर चोरीचा आरोप नक्की करून दिला असता की, अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत केले. ज्याने एक गोष्ट ही ठाऊक झाली की, नबी ﷺ सुद्धा मानव असल्या कारणाने भुलचुकीत पडू शकतात. दुसरी गोष्ट ही ठाऊक झाली की, आपण ﷺ अदृष्टाचे ज्ञाते नव्हते. नाहीतर आपल्यावर ﷺ ताबडतोब वस्तुस्थिती स्पष्ट होऊन गेली असती. तिसरी गोष्ट ही माहित झाली की, अल्लाहतआला आपल्या पैगंबराचे संरक्षण करतो; आणि जर कधी सत्त्याचे गुप्त राहून जाणे, आणि त्यापासून विचलित होण्याचा प्रसंग येऊन जाईल, तर ताबडतोब अल्लाहतआला त्याची जाणिव करून देतो आणि त्यांच्यांत सुधारणा करून देतो की, पैगंबराच्या स्वच्छ चारित्र्याचा हा प्रश्न आहे. हे ते स्वच्छ चारित्र्याचे ठिकाण आहे, जे पैगंबराशिवाय दुसऱ्या कोणाला प्राप्त नाही.

४) याच्याने अभिप्रेत तोच बनी उबैरिक आहे; ज्याने स्वत: चोरी केली; परंतु आपल्या गोडगोड बोलण्याने यहूद्याला चोर ठरविण्यावर ठाम झाले होते. पुढच्या महावाक्यात सुद्धा त्यांचे आणि त्यांच्या तरफदारी करणाऱ्यांचे वाईट कर्तृत्व दृष्टीगोचर करून नबी ﷺ ला सावध केले जात आहे.

५) म्हणजे चौकशी केल्याशिवाय आपण जी दगलबाजी करणाऱ्यांची तरफदारी केली आहे; त्यावर अल्लाहतआलाची माफी मागावी. यावरून ठाऊक झाले की, पक्षकारांमधून जो पर्यंत कोणाची गोष्ट खात्रीशिर होणार नाही, की तो सत्यावर आहे. त्याची तरफदारी आणि वकीली करणे योग्य नाही. याशिवाय जर कोणी पक्षकार धोक्याने किंवा फसविण्याने किंवा आपल्या गोडगोड बोलण्याने न्यायालय किंवा सत्ताधाऱ्यांकडून आपल्या हितात निर्णय करून घेईल, वास्तविक पाहता तो सत्त्यावर नसेल, तर अशा निर्णयाचे अल्लाहजवळ काही महत्त्व नाही. या गोष्टीला नबी ﷺ नी एका हदीसमध्ये असे वर्णन केले, ''सावधान ! मी एक मनुष्यच आहे, आणि ज्याप्रमाणे मी ऐकतो, त्याच्या प्रकाशात मी निर्णय करतो. शक्य आहे की, एक मनुष्य आपली दलील आणि बाजू मांडतांना, चाणाक्ष आणि हुशार असावा, आणि मी याच्या संभाषणाने प्रभावित होऊन, त्याच्या बाजूने निर्णय करून द्यावा; वास्तविक पाहता तो सत्यावर नसावा; आणि अशाप्रकारे मी दुसऱ्या मुसलमानाचा हक्क त्याला देऊन टाकावा; तर त्याला लक्षात ठेवावयास पाहिजे, हा अग्नीचा एक तुकडा आहे. ही त्याची इच्छा आहे की, त्याला घेऊन घ्यावे किंवा सोडून द्यावे.'' (स.बुखारी, स. मुस्लीम)

६) म्हणजे जेव्हा या गुन्ह्याच्या कारणाने जेव्हा त्याची विचारपूस होईल तर कोण त्याला अल्लाहच्या पकडीपासून वाचवू शकेन?

७) या विषयाचे एका दुसऱ्या महावाक्यात अल्लाहतआला म्हणतो, ''कोणी ओझे उचलणारा, कोण्या दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही.'' (सू. बनी इसराईल-१५) म्हणजे कोणी कोणाला जबाबदार राहणार नाही. प्रत्येक जिवाला तेच काही मिळेल, जे तो कमाई करून बरोबर घेऊन गेला असेल.

८) ज्याप्रमाणे बनु उबैरिकने केले की, चोरी स्वत: केली आणि आळ कोण्या दुसऱ्यावर घेतला. ही धुत्कार सार्वत्रिक आहे; जी बनु उबैरिकला पण शामिल करून घेते, आणि त्यांना पण जे त्यांच्यासारख्या वाईट गुणधर्माचे आहेत; आणि त्यांच्या सारख्या वाईट कामाचे करणारे असतील.

وَلَوْلَا فَضْلُ اللّٰهِ عَلَيْكَ وَ رَحْمَتُهٗ لَهَمَّتْ طَّآئِفَةٌ مِّنْهُمْ اَنْ يُّضِلُّوْكَ ؕ وَمَا يُضِلُّوْنَ اِلَّآ اَنْفُسَهُمْ وَمَا يَضُرُّوْنَكَ مِنْ شَيْءٍ ؕ وَاَنْزَلَ اللّٰهُ عَلَيْكَ الْكِتٰبَ وَالْحِكْمَةَ وَعَلَّمَكَ مَا لَمْ تَكُنْ تَعْلَمُ ؕ وَكَانَ فَضْلُ اللّٰهِ عَلَيْكَ عَظِيْمًا ﴿١١٣﴾

**आणि जर अल्लाहतआलाची कृपा आणि दया आपणावर नसती, तर त्यांच्या एका गटाने आपणास तुला बहकविण्याचे ठाणूनच घेतले होते[१]. परंतु खरोखरच ते स्वत:लाच मार्गभ्रष्ट करीत आहेत, हे आपले काहीही बिघडवूशकत नाही. अल्लाहतआलाने आपल्यावर पुस्तक आणि ज्ञान उतारले आहे; आणि आपणास ते शिकविले आहे, जे आपणास ठाऊक नव्हते[२]. आणि अल्लाहतआलाची आपणावर मोठीच कृपा आहे (११३)**

لَا خَيْرَ فِيْ كَثِيْرٍ مِّنْ نَّجْوٰىهُمْ اِلَّا مَنْ اَمَرَ بِصَدَقَةٍ اَوْ مَعْرُوْفٍ اَوْ اِصْلَاحٍۭ بَيْنَ النَّاسِ ؕ وَمَنْ يَّفْعَلْ ذٰلِكَ ابْتِغَآءَ مَرْضَاتِ اللّٰهِ فَسَوْفَ نُؤْتِيْهِ اَجْرًا عَظِيْمًا ﴿١١٤﴾

**यांचे बहुतेक खलबते भलाईने खाली आहेत[३]. हां! भलाई त्या सल्लामसलतीत आहे जो दानधर्म करण्याचा किंवा चांगल्या कामाचा किंवा लोकांत समझोता करविण्याचा हुकूम करेल[४]; आणि जो मनुष्य फक्त अल्लाहतआलाची प्रसन्नता प्राप्त करण्याच्या विचाराने हे काम करेल[५]; त्याला आम्ही खचितच् मोठे पुण्य देऊ[६] (११४)**

१) हा अल्लाहतआलाच्या खास संरक्षण आणि देखरेखीचा उल्लेख आहे; ज्याची व्यवस्था पैगंबर ﷺ लोकांसाठी केली जाते. जे पैगंबरांवर अल्लाहची खास कृपा आणि त्याच्या विशेष दयेचे प्रदर्शक आहे. ताइफा (समूह) ने ते लोक अभिप्रेत आहेत; जे बनु उबैरिकच्या समूहामध्ये रसूल ﷺ च्या सेवेमध्ये त्याचे निर्दोष असणे सांगत होते. ज्यामुळे असे वाटत होते की, नबी ﷺ त्या माणसाला चोरीच्या आरोपातून मुक्त करून देतील; जो वास्तविक चोर होता.

२) ही दुसऱ्या कृपा आणि उपकाराची चर्चा आहे. जी आपल्यावर ﷺ पुस्तक आणि ज्ञान (सुन्नत) अवतरीत करून आणि आवश्यक गोष्टींचे ज्ञान देऊन करण्यात आली. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी फरमाविले, ''अशाच प्रकारे, आम्ही आपल्याकडे (कुरआन घेऊन) एक देवदूत पाठविला, आपल्या हुकूमाने. तुला ठाऊक नव्हते की, पुस्तक काय आहे? आणि ईमान काय आहे? (सू. शुरा-५२) ''आपणास असे वाटत नव्हते की, तुझ्यावर पुस्तक उतारण्यांत येईल, परंतु तुझ्या पालनकर्त्याच्या दयेने (हे पुस्तक उतारण्यात आले.)'' (सू. कसस-८६) या सर्व महावाक्यांवरून माहित झाले की, अल्लाहने आपल्यावर ﷺ कृपा आणि उपकार केला; आणि पुस्तक आणि ज्ञान (म्हणजे सुन्नत) पण दिले. याच्या शिवाय दुसऱ्या पुष्कळश्या गोष्टींचे आपणांस ज्ञान दिले गेले जे आपणात ठाऊक नव्हते. हे पण जणू आपल्या ﷺ अदृष्टाचा ज्ञाता' होण्याचे निरसन आहे; कारण की जो स्वत: 'अदृष्टाचा ज्ञाता' असेल, त्याला तर कोणा दुसऱ्या कडून माहिती मिळेल, वहयाच्या मार्गाने किंवा दुसऱ्या कोण्या पद्धतीने तो 'अदृष्टाचा ज्ञाता' नसतो.

३) 'नजवा' (खलबते) ने अभिप्रेत त्या गोष्टी आहेत, ज्या दांभिक लोक आपसांत मुसलमानांच्या विरूद्ध किंवा एक दुसऱ्याच्या विरूद्ध करीत होते.

४) म्हणजे दानधर्म, मआरूफ (जो प्रत्येक पुण्याच्या कामाला संमिलित करतो) आणि माणसांमध्ये सुधारणा च्या बाबतीत चर्चा, भलाईवर निर्भर आहेत. जशी की, हदीसमध्ये सुद्धा या कामांचे महत्त्व आणि श्रेष्ठत्व वर्णन केले गेले आहे.

५) कारण की, जर 'इखलास' (म्हणजे अल्लाहच्या प्रसन्नतेचा उद्देश) जर नसेल, तर मोठ्यांत मोठे कर्म, फक्त व्यर्थ जाणार नाही, परंतु जीवाला घोर बनून जाईल, 'फनऊ जबिल्लाहे मिनर्रिआ वल निफाक'

६) हदीसीमध्ये सुद्धा चर्चित कर्मांचे मोठे श्रेष्ठत्व आले आहे. अल्लाहच्या मार्गांत हलाल कमाईने एका खजुरीच्या बरोबर दानधर्म पण ओहुद पर्वता एवढा होऊन जाईल. (स.मुस्लीम किताबुल जकात) चांगल्या गोष्टींची प्रसिद्धी पण मोठे महत्त्व ठेवते. अशाच प्रकारे नातेवाईक, मित्र आणि आपसात नाराज असलेले इतर लोक यांच्यात समझोता करून देणे फार मोठे पुण्याचे काम आहे. एका हदीसमध्ये याला नफिल नमाजी, नफिल उपवास आणि नफिल दानधर्मापेक्षा श्रेष्ठ दाखविण्यात आले आहे. येथ पावेतो की, समझोता करून देणाऱ्याला खोटे बोलण्याचीपण परवानगी देण्यात आली आहे. कारण की, त्याला एक दुसऱ्याला जवळ आणण्यासाठी खोटा परंतु चांगल्या सल्लामसलतीनेयुक्त (दरोगे मसलेहत आमेज) ची जरूरी पडली तर त्याने यांत सुद्धा मागे पुढे पाहू नये, ''तो मनुष्य खोटारडा नाही, जो समझोता करण्यासाठी चांगल्या गोष्टींची चुगली खातो किंवा चांगली गोष्ट करतो'' (स.बुखारी व मुस्लीम)

وَمَنْ يُّشَاقِقِ الرَّسُوْلَ مِنْۢ بَعْدِ مَا تَبَيَّنَ لَهُ الْهُدٰى وَيَتَّبِعْ غَيْرَ سَبِيْلِ الْمُؤْمِنِيْنَ نُوَلِّهٖ مَا تَوَلّٰى وَنُصْلِهٖ جَهَنَّمَ ؕ وَسَآءَتْ مَصِيْرًا ﴿١١٥﴾

आणि जो मनुष्य सरळमार्ग स्पष्ट दिसून आल्यावर सुध्दा पैगंबराच्या उलट जाईल आणि सर्व मुसलमानांचा मार्ग सोडून चालेल आम्ही त्याला तिकडेच वळवून देऊ जिकडे ता स्वत:वळला आहे. आणि नरकाग्नीत टाकून देऊ[१], ते पोहोचण्याचे फारच वाईट ठिकाण आहे ﴿११५﴾

اِنَّ اللّٰهَ لَا يَغْفِرُ اَنْ يُّشْرَكَ بِهٖ وَيَغْفِرُ مَا دُوْنَ ذٰلِكَ لِمَنْ يَّشَآءُ ؕ وَمَنْ يُّشْرِكْ بِاللّٰهِ فَقَدْ ضَلَّ ضَلٰلًاۢ بَعِيْدًا ﴿١١٦﴾

या गोष्टीला अल्लाहतआला कधीच माफ करणार नाही की, त्याच्या बरोबर भागीदार ठरविला जावा. हां! 'शिर्क' च्या शिवाय अपराध ज्याचे इच्छेल त्याचे माफ करून टाकतो आणि अल्लाहतआला बरोबर भागीदार ठरविणारा, (सरळमार्गावरून) फारच दूर भटकून गेला ﴿११६﴾

اِنْ يَّدْعُوْنَ مِنْ دُوْنِهٖۤ اِلَّاۤ اِنٰثًا ۚ وَاِنْ يَّدْعُوْنَ اِلَّا شَيْطٰنًا مَّرِيْدًا ﴿١١٧﴾

हे तर अल्लाहतआलाला सोडून फक्त स्त्रियांचाच धावा करतात[२] आणि वास्तविक ते शिरजोर शैतानाची पुजा करतात[३] ﴿११७﴾

لَّعَنَهُ اللّٰهُ ۘ وَقَالَ لَاَتَّخِذَنَّ مِنْ عِبَادِكَ نَصِيْبًا مَّفْرُوْضًا ﴿١١٨﴾

ज्याला अल्लाहतआलाने शापित केले आहे; आणि त्याने विडा उचलला आहे की, तुझ्या सेवकांमधून मी निश्चित केलेला वाटा घेवूनच राहील[४] ﴿११८﴾

१) मार्गदर्शनाचे स्पष्ट होऊन गेल्यानंतर रसूल ﷺ चा विरोध आणि ईमानवाल्यांचा मार्ग सोडून आणखी कोण्यामार्गाचे अनुकरण इस्लाम धर्माकडून फिरून जाणे आहे. ज्यावर येथे जहन्नमची धमकी देण्यात आली आहे. मोमिनीन ने अभिप्रेत सहाबा कराम ﷺ आहेत. जे इस्लाम धर्माचे पहिले अनुयायी आणि त्याच्या शिक्षणाचा पूर्ण नमुना होते. आणि या महावाक्यांच्या अवतरण्याच्यावेळी त्यांच्याशिवाय मोमेनिनचा कोणी दुसरा समूह उपस्थित नव्हता की, तो अभिप्रेत असावा. यासाठी रसूल ﷺ ला विरोध आणि मोमिनीन शिवाय दुसऱ्यांच्या मार्गाचे अनुकरण दोन्ही वास्तविक एकाच गोष्टीचे नाव आहे. यासाठी सहाबा कराम ﷺ चे मार्ग आणि पध्दत (मिनहाज) पासून तोंड फिरवणे सुद्धा कुफ्र आणि मार्गभ्रष्ट होणे आहे. काही धर्मपंडितांनी सबीलुल मोमिनीन ने अभिप्रेत उम्मतीची एक मतैक्य घेतली आहे. म्हणजे उम्मतीच्या एक मतैक्यापासून तोंड फिरविणे सुद्धा 'कुफ्र' आहे, इजमाए उम्मतचा अर्थ आहे, कोण्या मसल्यात, उम्मतच्या सर्व धर्मपंडितात आणि धर्मशास्त्रीत एकजुट किंवा कोण्या मसल्यावर सहाबा कराम ﷺ ची एकजुट हे दोन्ही प्रकार 'इजमाए उम्मत' चे आहेत. आणि दोघांना नाकारणे, किंवा यांच्यातून कोण्या एकाला. नाकारणे 'कुफ्र'आहे. तथापि सहाबा कराम ﷺ ची एकमतैक्यता तर पुष्कळशा मसल्यांत मिळते. परंतु इजमाए सहाबाच्या नंतर कोण्या मसल्यामध्ये पूर्ण उम्मतची एकजुट आणि इजमाचे दावे तर पुष्कळशा मसाईलमध्ये केले गेले आहे, परंतु वास्तवात असे 'इजमाऔ मसाएल', फारच कमी आहेत ज्यात खरोखरच उम्मतच्या सर्व धर्मपंडितांच्या आणि धर्म शास्त्रींची एकजुट असेल. तथापि असे जे मसाईल पण आहे, त्यांना नाकारणे पण सहाबांच्या इजमाअ ला नाकारण्याप्रमाणे कुफ्र आहे. यासाठी सहीह हदीसमध्ये आहे, ''अल्लाहतआला माझ्या उम्मतला मार्ग भ्रष्टतेवर एकत्रित करणार नाही; आणि जमाअतवर अल्लाहचा हात आहे. (स.तिर्मिझी)

२) 'इनास' (स्त्रिया) ने अभिप्रेत एक तर त्यामूर्ती आहेत, ज्यांची नावे स्त्रीलिंगी होते जसे, लात, अुज्जा, मनात, नाईला वगैरे किंवा याने अभिप्रेत देवदूत आहेत. कारण की, अरबचे मुशरिक देवदूतांना अल्लाहच्या मुली समजत आणि त्यांची उपासना करीत.

३) मूर्ती,देवदूत आणि दुसऱ्या व्यक्तींची उपासना वास्तविक शैतानाची उपासना आहे. कारण की, शैतानच माणसाला अल्लाहच्या चौखटीतून सोडवून दुसऱ्यांच्या स्थानांवर आणि चौकटीवर झुकवतो; जसे की पुढील महावाक्यांत आहे.

४) निश्चित केलेल्या वाट्याने अभिप्रेत ती (नजर व नियाज) भेट आणि चढावा पण असू शकतो, जो मुशरेकीन आपल्या मूर्ती आणि कबरेत दफन असलेल्यां व्यक्तींच्या नावावर काढतात आणि नरकाग्नीत जाणाऱ्यांचा तो 'कोटा' पण होऊ शकतो, ज्यांना शैतान मार्गभ्रष्ट करून आपल्याबरोबर नरकाग्नीमध्ये घेऊन जाईल.

وَلَاُضِلَّنَّهُمۡ وَلَاُمَنِّيَنَّهُمۡ وَلَاٰمُرَنَّهُمۡ فَلَيُبَتِّكُنَّ اٰذَانَ الۡاَنۡعَامِ وَلَاٰمُرَنَّهُمۡ فَلَيُغَيِّرُنَّ خَلۡقَ اللّٰهِ‌ؕ وَمَنۡ يَّتَّخِذِ الشَّيۡطٰنَ وَلِيًّا مِّنۡ دُوۡنِ اللّٰهِ فَقَدۡ خَسِرَ خُسۡرَانًا مُّبِيۡنًا ۝١١٩

**आणि त्यांना सरळमार्गाहून बहकवित राहील. आणि खोटी आश्वासने देत राहील[१] आणि त्यांना शिकवील की त्यांनी जनावरांचे कान चिरावेत[२]. आणि त्यांना सांगेन की, अल्लाहने बनविलेल्या चेहऱ्याला बिघडवून टाकावे[३]. ऐका! जो मनुष्य अल्लाहला सोडून शैतानाला आपला मित्र बनवीन; तो स्पष्ट नुकसानांत पडेल ११९**

يَعِدُهُمۡ وَيُمَنِّيۡهِمۡ‌ؕ وَمَا يَعِدُهُمُ الشَّيۡطٰنُ اِلَّا غُرُوۡرًا ۝١٢٠

**तो यांच्याशी (फक्त) तोंडी वायदे करत राहील; आणि खोटे आमिष व प्रलोभने दाखवत राहील; (परंतु लक्षात ठेवा!) शैतानाचे जे वायदे यांच्याशी आहेत; ती निव्वळ फसवणूक आहे १२०**

اُولٰٓـئِكَ مَاۡوٰٮهُمۡ جَهَـنَّمُ وَلَا يَجِدُوۡنَ عَنۡهَا مَحِيۡصًا ۝١٢١

**हे ते लोक आहेत, ज्यांचे ठिकाण जहन्नम आहे. जेथून त्यांना मुक्तता मिळणार नाही. १२१**

وَالَّذِيۡنَ اٰمَنُوۡا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ سَنُدۡخِلُهُمۡ جَنّٰتٍ تَجۡرِىۡ مِنۡ تَحۡتِهَا الۡاَنۡهٰرُ خٰلِدِيۡنَ فِيۡهَاۤ اَبَدًا‌ ؕ وَعۡدَ اللّٰهِ حَقًّا‌ ؕ وَمَنۡ اَصۡدَقُ مِنَ اللّٰهِ قِيۡلًا ۝١٢٢

**आणि जे ईमान आणतीलआणि चांगली कामे करतील, त्यांना आम्ही स्वर्गाच्या त्या बागात घेऊन जाऊ. ज्यांच्याखाली पाट वहात आहेत; जेथे हे नित्य राहतील, हा आहे अल्लाहचा वायदा जो निखालस खरा आहे.आणि कोण आहे, जो आपल्या बोलण्यात अल्लाहपेक्षा जास्त खरा असेल[४] १२२**

لَـيۡسَ بِاَمَانِيِّكُمۡ وَلَاۤ اَمَانِىِّ اَهۡلِ الۡكِتٰبِ‌ ؕ مَنۡ يَّعۡمَلۡ سُوۡٓءًا يُّجۡزَ بِهٖ ۙ وَلَا يَجِدۡ لَهٗ مِنۡ دُوۡنِ اللّٰهِ وَلِيًّا وَّلَا نَصِيۡرًا ۝١٢٣

**वस्तुस्थिती तुमच्या अपेक्षेप्रमाणे नाही आणि, ग्रंथधारी लोकांच्या अपेक्षांवर निर्भर नाही; जो वाईट करेल, त्याची शिक्षा पावेल, आणि अल्लाहतआलाशिवाय त्याची तरफदारी आणि मदत करणारा त्यांला कोणी आढळणार नाही १२३**

१) या त्या निरर्थक आशा आहेत, ज्या शैतानाच्या वसवश्यांनी आणि हस्तक्षेपाने निर्माण होतात आणि माणसांच्या मार्गभ्रष्टतेला कारणीभूत होतात.

२) हे 'बहीरा' आणि 'सायबा' जनावरांची चिन्हे आणि स्वरूप आहेत. मुशरेकीन त्यांना मूर्तींच्या नांवावर सोडत, तर ओळखीसाठी त्यांचे कान वगैरे चिरून टाकत असत.

३) अल्लाहच्या निर्मितीत बदलाचे प्रकार वर्णन केले गेले आहे. एक तर तोच ज्याचा येथे उल्लेख झाला. म्हणजे कान वगैरे कापणे, चिरणे, छिद्र करणे. या शिवाय आणखी कित्येक प्रकार आहेत. उदाहरणार्थ अल्लाहतआलाने चंद्र, सूर्य, दगड आणि अग्नी वगैरे वस्तू वेगवेगळ्या उद्देशाने बनविल्या आहेत. परंतु बहुदेववाद्यांनी याच्या निर्मितीच्या उद्देश्यांना बदलून त्यांना उपास्य बनवून घेतले. किंवा बदलाचा अर्थ नैसर्गिक स्थितीत बदल करणे आहे. किंवा विहीत होण्यात आणि निषीद्ध होण्यात बदल करणे आहे, वगैरे. या बदलात, पुरूषांची नसबंदी करून अशाच प्रकारे स्त्रियांचे ऑपरेशन करून त्यांना संतती निर्माण करण्याच्या योग्यतेपासून वंचित करून देणे. मेकअपच्या नांवावर भुवयांचे केस उपटून आपल्या चेहऱ्यांना विद्रुप करणे. आणि गोंदविणे वगैरे पण शामिल आहेत. ही सर्व शैतानी कामे आहेत; ज्यांच्यापासून वाचणे आवश्यक आहे. तथापि जनावरांना यासाठी खच्ची करणे की त्यांच्यापासून जास्त नफा मिळू शकेल किंवा त्यांचे मांस जास्त चांगले होऊ शकेल किंवा याच प्रकारचा कोणी आणखी उद्देश असेल तर, जाएज् (योग्य) आहे. याचे समर्थन याने पण होते की, नबी करीम ﷺ नी खच्ची केलेली जनावरे कुरबानीत जबाह केली आहेत. जर जनावरांचे खच्ची करणे रास्त नसते, तर आपण ﷺ नी त्यांची कुरबानी केली नसती.

४) शैतानी वायदे तर निव्वळ धोका आणि फसवणूक आहे; परंतु याच्या तुलनेत अल्लाहचे वायदे, जे ईमानवाल्यांशी केले जातात, खरे आणि सत्य आहेत. आणि अल्लाहपेक्षा खरा कोण असू शकतो? परंतु माणसाचा मामला पण विचित्र आहे. तो खऱ्याच्या गोष्टीला कमी मानतो, आणि खोट्याच्या मागे जास्त चालतो. म्हणून पाहून घ्या की, शैतानी गोष्टीचे चलन सार्वत्रिक आहे; आणि अल्लाहच्या कामांना अंगिकारणारे प्रत्येककाळी आणि प्रत्येक ठिकाणी कमीच राहिले आहेत. आणि कमीच आहेत. ''माझे आभार मानणारे सेवक कमीच आहेत'' (सू. सबा-१३)

وَمَنْ يَّعْمَلْ مِنَ الصّٰلِحٰتِ مِنْ ذَكَرٍ اَوْ اُنْثٰى وَهُوَ مُؤْمِنٌ فَاُولٰٓئِكَ يَدْخُلُوْنَ الْجَنَّةَ وَلَا يُظْلَمُوْنَ نَقِيْرًا ﴿١٢٤﴾

आणि जो ईमानवाला असेल (मग तो) पुरूष असो का स्त्री, आणि तो चांगली कामे करील खचितच् असे लोक स्वर्गात जातील आणि खजुरीच्या बीच्या छिद्रा इतका सुद्धा त्याचा हक्क मारला जाणार नाही[१] (१२४)

وَمَنْ اَحْسَنُ دِيْنًا مِّمَّنْ اَسْلَمَ وَجْهَهٗ لِلّٰهِ وَهُوَ مُحْسِنٌ وَّاتَّبَعَ مِلَّةَ اِبْرٰهِيْمَ حَنِيْفًا ۭ وَاتَّخَذَ اللّٰهُ اِبْرٰهِيْمَ خَلِيْلًا ﴿١٢٥﴾

आणि धर्माच्या अनुषंगाने त्याच्यापेक्षा कोण चांगला आहे, जो आपली मान अल्लाहच्या हुकूमांवर झुकवून देईल. आणि असेलही भली कामे करणारा! त्याबरोबरच एकनिष्ठ इब्राहीमच्या धर्माचे अनुकरण करीत असेल आणि इब्राहीम (अ.)ला अल्लाहतआलाने आपला दोस्त बनवून घेतले आहे.[२] (१२५)

وَلِلّٰهِ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ۭ وَكَانَ اللّٰهُ بِكُلِّ شَيْءٍ مُّحِيْطًا ﴿١٢٦﴾

आणि आकाशांत आणि पृथ्वीत जे काही आहे, सर्व अल्लाहचेच आहे आणि अल्लाहतआला प्रत्येक वस्तूला घेरून ठेवणारा आहे (१२६)

وَيَسْتَفْتُوْنَكَ فِي النِّسَاۗءِ ۭ قُلِ اللّٰهُ يُفْتِيْكُمْ فِيْهِنَّ ۙ وَمَا يُتْلٰى عَلَيْكُمْ فِي الْكِتٰبِ فِيْ يَتٰمَى النِّسَاۗءِ الّٰتِيْ لَا تُؤْتُوْنَهُنَّ مَا كُتِبَ لَهُنَّ وَتَرْغَبُوْنَ اَنْ تَنْكِحُوْهُنَّ وَالْمُسْتَضْعَفِيْنَ مِنَ الْوِلْدَانِ ۙ وَاَنْ تَقُوْمُوْا لِلْيَتٰمٰى بِالْقِسْطِ ۭ وَمَا تَفْعَلُوْا مِنْ خَيْرٍ فَاِنَّ اللّٰهَ كَانَ بِهٖ عَلِيْمًا ﴿١٢٧﴾

आणि आपल्याजवळ स्त्रियांच्या बाबतीत हुकूम जाणून घेऊ इच्छितात.[३] आपण सांगून टाका की, स्वतः अल्लाहतआला त्यांच्या बाबतीत आदेश देत आहे; आणि कुरआनाची ती महावाक्ये जी तुमच्यासमोर अनाथ मुलींच्या बाबतीत वाचून दाखविली जातात, ज्यांना तुम्ही त्यांचा निश्चित केलेला हक्क देत नाही[४] आणि त्यांना आपल्या लग्न बंधनात आणण्याची इच्छा बाळगतात[५]; आणि दुर्बल बालकांच्या बाबतीत[६] आणि या बाबतीत की, अनाथांशी व्यवहार न्यायाने करा[७]. तुम्ही जे भले काम कराल नि:संशय अल्लाह त्याला चांगल्या प्रकारे जाणतो (१२७)

وَاِنِ امْرَاَةٌ خَافَتْ مِنْۢ بَعْلِهَا نُشُوْزًا اَوْ اِعْرَاضًا فَلَا جُنَاحَ عَلَيْهِمَآ اَنْ يُّصْلِحَا بَيْنَهُمَا صُلْحًا ۭ وَالصُّلْحُ خَيْرٌ ۭ وَاُحْضِرَتِ الْاَنْفُسُ الشُّحَّ ۭ وَاِنْ تُحْسِنُوْا وَتَتَّقُوْا فَاِنَّ اللّٰهَ كَانَ بِمَا تَعْمَلُوْنَ خَبِيْرًا ﴿١٢٨﴾

आणि जर कोण्या स्त्रीला आपल्या पतीकडून विचित्र व वाईट स्वभाव आणि दुर्लक्ष करण्याचे भय असेल, तर दोन्ही आपसांत जो समझोता करून घेतील, त्यामध्ये कोणावर काही पाप नाही[८]. तडजोड फार चांगली गोष्ट आहे. लोभ प्रत्येक जीवाबरोबर सामिल करून देण्यात आला आहे[९]. आणि जर तुम्ही चांगले वर्तन कराल आणि सदाचरण कराल, तर तुम्ही जे काही करत आहात अल्लाह त्याच्याशी पूर्ण वाकगार आहे (१२८)

وَلَنْ تَسْتَطِيْعُوْٓا اَنْ تَعْدِلُوْا بَيْنَ النِّسَاۗءِ وَلَوْ حَرَصْتُمْ فَلَا تَمِيْلُوْا كُلَّ الْمَيْلِ فَتَذَرُوْھَا كَالْمُعَلَّقَةِ ۭ وَاِنْ تُصْلِحُوْا وَتَتَّقُوْا فَاِنَّ اللّٰهَ كَانَ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿١٢٩﴾

आणि तुमच्याने हे कधीच होऊ शकणार नाही की, आपल्या सर्व पत्नीमध्ये सर्वप्रकारे न्याय कराल, जरी तुम्ही याची कितीही इच्छा बाळगाल आणि प्रयत्न कराल, म्हणून पूर्णपणे एकीकडे झुकून दुसरीला अधांतरी लटकत ठेवू नका[१०]; आणि जर तुम्ही सुधारणा कराल आणि अल्लाहला भीत रहाल तर नि:संशय अल्लाहतआला मोठाच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे (१२९)

१) जसे की पहिले येऊन गेले आहे की, ग्रंथधारी लोक आपल्या बाबतीत फारच चांगल्या धारणेंत व्यस्त होते. येथे अल्लाहतआलाने पुन्हा त्यांच्या चांगल्या अनुमानाचा पर्दा फाडून सांगितले की, परलोकांतील यश केवळ आशा आणि आकांक्षानी मिळणार नाही; त्याच्यासाठी तर ईमान आणि चांगल्या कामाचे भांडवल आवश्यक आहे. जर याच्या उलट कर्मपत्रांत वाईट गोष्टीच असतील, तर त्याला कोणत्याही स्वरूपांत त्याची सजा भोगावी लागेल. तेथे कोणी असा मित्र आणि मददगार राहणार नाही, जो वाईटाच्या शिक्षेपासून वाचवू शकेल. या महावाक्यात ग्रंथधारी लोकांबरोबर अल्लाहने ईमानवाल्यांनापण संबोधित केले आहे; कारण की, त्यांनी सुद्धा यहूदी आणि खिस्त्यांसारखी चुकीची धारणा, चांगले अनुमान आणि कर्माशिवाय आकांक्षा आणि इच्छा यापासून आपल्या स्वत:ला वाचवावे. परंतु खेदाने म्हणावे लागते की मुसलमान या तंबीहिनंतर सुद्धा निरर्थक कल्पना विलासांत दंग होऊन गेलेत, ज्यांत पूर्वींच्या उम्मतींची पकड झाली आणि आज कर्महिनता आणि दुष्कर्मता मुसलमानांचा पण तौर तरीका झाला आहे.

२) येथे सफलतेचे एक प्रमाण आणि त्याचा एक नमुना वर्णन केला जात आहे. प्रमाण हे आहे की, आपल्या स्वत:ला अल्लाहच्या हवाली करून द्यावे, मुहसिन (कर्म करतांना आपणास अल्लाह पहात आहे असे समजणारा) बनून जावे; इब्राहीमच्या मार्गाचे अनुसरण करावे. आणि नमुना ह. इब्राहीम عليه السلام चा आहे. ज्यांना अल्लाहतआलाने आपला मित्र

बनविले. 'खलील' चा अर्थ आहे की, ज्याच्या मनांत अल्लाहतआलाचे प्रेम अशा प्रकारे भिनून जावे की, कोण्या दुसऱ्यासाठी तेथे जागा राहू नये. आणि नबी ﷺ नी फर्माविले, 'अल्लाहने मला पण खलील बनविले आहे, ज्याप्रमाणे त्याने इब्राहीम عليه السلام ला खलील बनविले.' (स.मुस्लीम)
३) स्त्रियांच्या बाबतीत जे प्रश्न केले जात होते, येथून त्यांची उत्तरे देण्यात येत आहेत.
४) म्हणजे अल्लाहतआला यांचे बाबतीत स्पष्टीकरण करीत आहे; आणि अल्लाहच्या पुस्तकाचे ते महावाक्य स्पष्टीकरण करते; जे याच्यापूर्वी अनाथ मुलींच्या बाबतीत अवतीर्ण होऊन चुकले आहे. अभिप्रेत आहे, सू.निसाची आयत ३, ज्यात त्या लोकांना या अन्यायापासून मना करण्यात आले आहे की, ते अनाथ मुलींशी त्यांच्या रूपसौंदर्याच्या कारणाने लग्न तर करून घेत असत परंतु (महेर मिस्ल) महेर जी त्यांच्या घराण्यात दिली जाते, देण्याला नाकारात होते.
५) याची दोन भाषांतरे केली गेली आहेत. एक तर तोच, जो मरहूम भाषांतरकाराने केला आहे. यांत 'फी' चा शब्द 'महजुफ' आहे. याचे दुसरे भाषांतर 'अन्' चा शब्द 'महजुफ ' मानून केला गेला आहे. म्हणजे ''तर गबुना अन् अन् तनकीहुहुन्न'' (तुम्हाला त्यांच्याशी लग्न करण्याची आवड नसेल) 'रगीबा' चा 'सिला' अन् येईल तर अर्थ आक्षेप किंवा आवड नसण्याचा होतो; जसे, ''व मय्यरगबु अन् मिल्लते इब्राहीम'' मध्ये आहे. हा जणू दुसरा प्रकार वर्णन केला गेला आहे. की अनाथ मुलगी कधी कधी कुरूप असते, तर तिचे वली (संरक्षक) किंवा तिच्या बरोबर पैतृक संपत्तीत (विरासत) भागीदार, दुसरे वारसदारांनी स्वत:लापण तिच्याशी लग्न करणे, पसंत केले नसते. आणि कोण्या दुसऱ्या ठिकाणी पण तिचे लग्न न करते. कारण की, कोणी आणखी मनुष्य तिच्या इस्टेटिच्या वाट्यात शामील न व्हावा. अल्लाहतआलाने पहिल्या प्रकाराप्रमाणे अन्यायाच्या या दुसऱ्या प्रकाराला पण मना केले.
६) अनाथ मुलींच्या बाबतीत तुम्हास जे वाचवून दाखविण्यात येत आहे, (सू.निसाची आ.क्र.३) आणि दुर्बल बालकांच्या बाबतीत जे वाचून दाखविण्यात येते याच्याने अभिप्रेत तो कुरआनाचा हुकूम 'युसीकुमुल्लाहु फी अवलादिकुम' आहे; ज्याच्यात मुलांच्या बरोबर मुलींनाही पैतृक संपत्तीत वाटेकरी बनविण्यात आले आहे. जेव्हा की अज्ञान काळात फक्त मोठ्या मुलांनाच वारसदार समजण्यात येत असे. लहान दुर्बल मुले, आणि स्त्रिया पैतृक संपत्तीपासून वंचित राहत होती. धर्मशास्त्राने सर्वांना वारसदार ठरविले.
७) याचा 'अतफ' पण 'यतामन्निसाअ' वर आहे; म्हणजे अल्लाहच्या पुस्तकाचा हा हुकूम पण तुम्हास सांगण्यांत येत आहे की, अनाथांशी न्यायाचा मामला करा. अनाथ मुलगी सौंदर्यवती असली तरी आणि कुरूप असली तरी दोन्ही प्रकारात न्याय करा (जसा की, तपशील येऊन गेला!)
८) पती जर काही कारणाने पत्नीला नापसंद करीत असेल, आणि तिच्या पासून दूर रहाणे आणि तिची उपेक्षा करीत असणे नित्याचे झाले असेल, किंवा एकापेक्षा जास्त पत्न्या असल्याच्या प्रकारात कोण्या कमी सौंदर्यवालीची उपेक्षा करेल, तर स्त्रीने आपला काही हक्क सोडून, (मेहेरने किंवा अन्न वस्त्राने किंवा पाळीने) पतीशी तडजोड करून घ्यावी. तर अशा तडजोडीत पती किंवा पत्नीवर काहीही पाप नाही कारण की, समेट (तडजोड) प्रत्येक स्थितीत चांगली आहे. ह.उम्मुल मोमिनीन सौदा رضي الله عنها नी पण म्हातारपणांत आपली पाळी ह.आयेशा رضي الله عنها करता बहाल करून दिली होती; ज्याला नबी ﷺ नी मान्यता दिली होती. (स.बुखारी व मुस्लीम किताबुन्निकाह)
९) 'शुहह' कंजुषपणा आणि लालची वृत्तीला म्हणतात. याठिकाणी अभिप्रेत आपला आपला फायदा आहे. जो प्रत्येकाला प्रिय असतो. म्हणजे प्रत्येकजण, आपल्या फायद्यांत कंजुषपणा आणि लालची वृत्तीने वागतो.
१०) हा एक दुसरा प्रकार आहे की, एका माणसाला एकापेक्षा जास्त पत्न्या असाव्यात. तर आंतरिक संबंध आणि प्रेमात, तो सर्वांबरोबर सारखी वागणूक ठेवू शकत नाही. कारण प्रेम हे मनाचे काम आहे; ज्यावर कोणाचा अधिकार नाही. स्वत: नबी ﷺ चे पण आपल्या पत्न्यांमधून सर्वांत जास्त प्रेम ह.आयेशा رضي الله عنها वर होते. इच्छा असून सुद्धा न्याय न करण्याचा अर्थ, हीच आंतरिक ओढ आणि प्रेमांत समानतेची कमी आहे. जर हे आंतरिक प्रेम जाहिरी हक्कांच्या समानतेमध्ये अडथळा बनले नाही, तर अल्लाहजवळ आक्षेपार्ह नाही. ज्याप्रमाणे नबी ﷺ नी याचा फार उत्तम नमुना आचरून दाखविला. परंतु बहुतेक लोक याच आंतरिक प्रेमामुळे दुसऱ्या पत्नीचे हक्क अदा करण्यात फारच कोताई करतात. आणि उघडरित्यापण 'प्रिय पत्नी' सारखे दुसऱ्या पत्नीचे हक्क अदा करीत नाहीत. आणि त्यांना 'अधांतरी लोंबकळलेली' अशा स्थितीत ठेवतात. त्यांना तलाक देत नाही, तसेच पत्नीत्वाचे हक्कपण अदा करीत नाही. हा फारच जुलूम आहे, ज्यापासून येथे मना करण्यात आले आहे. आणि नबी ﷺ नी पण फरमाविले आहे, ''ज्या माणसाला दोन पत्न्या असतील, आणि तो एकीच्याचकडे झुकून राहील (म्हणजे दुसरीच्याकडे दुर्लक्ष करील) तर कयामतच्या दिवशी तो अशाप्रकारे येईल की, त्याच्या शरीराचा एक भाग (म्हणजे अर्धा) लुळा पडलेला असेल. (तिर्मिझी किताबुन् निकाह)

وَاِنۡ يَّتَفَرَّقَا يُغۡنِ اللّٰهُ كُلًّا مِّنۡ سَعَتِهٖ ؕ وَكَانَ اللّٰهُ وَاسِعًا حَكِيۡمًا ﴿١٣٠﴾

आणि जर पती पत्नी वेगळे होऊन जातील, तर अल्लाहतआला आपल्या औदार्याने प्रत्येकाला एकदुसऱ्यावर अवलंबून ठेवणार नाही.[१] अल्लाहतआला फारच उदार आणि ज्ञानी आहे (१३०)

وَلِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ ؕ وَلَقَدۡ وَصَّيۡنَا الَّذِيۡنَ اُوۡتُوا الۡكِتٰبَ مِنۡ قَبۡلِكُمۡ وَاِيَّاكُمۡ اَنِ اتَّقُوا اللّٰهَ ؕ وَاِنۡ تَكۡفُرُوۡا فَاِنَّ لِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ ؕ وَكَانَ اللّٰهُ غَنِيًّا حَمِيۡدًا ﴿١٣١﴾

पृथ्वी आणि आकाशातील प्रत्येक वस्तू अल्लाहच्या मालकीची आहे. आणि खरोखरच आम्ही, त्या लोकांना जे तुमच्यापूर्वी पुस्तक दिले गेले होते आणि तुम्हास पण हाच हुकूम केला आहे की, अल्लाहला भीत रहा; आणि जर तुम्ही कुफ्र केले, तर लक्षात ठेवा की, जे काही आकाशात आहे, आणि जे काही पृथ्वीत आहे, ते अल्लाहसाठीच आहे; आणि अल्लाह निरपेक्ष आणि सुस्तुत्य आहे (१३१)

وَلِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ وَكِيۡلًا ﴿١٣٢﴾

अल्लाहच्या अधिकारात आहेत, आकाशांतील सर्व वस्तू आणि जमिनीच्या सुद्धा आणि अल्लाह कर्ताहर्ता पुरेसा आहे (१३२)

اِنۡ يَّشَاۡ يُذۡهِبۡكُمۡ اَيُّهَا النَّاسُ وَيَاۡتِ بِاٰخَرِيۡنَ ؕ وَكَانَ اللّٰهُ عَلٰى ذٰلِكَ قَدِيۡرًا ﴿١٣٣﴾

जर तो इच्छिल तर हे लोकांनो! तो तुम्हा सर्वांस नष्ट करून टाकीन; आणि दुसऱ्यांना घेऊन येईल, अल्लाहतआला या गोष्टीवर पूर्ण सामर्थ्य बाळगतो[२] (१३३)

مَنۡ كَانَ يُرِيۡدُ ثَوَابَ الدُّنۡيَا فَعِنۡدَ اللّٰهِ ثَوَابُ الدُّنۡيَا وَالۡاٰخِرَةِ ؕ وَكَانَ اللّٰهُ سَمِيۡعًۢا بَصِيۡرًا ﴿١٣٤﴾

जो मनुष्य या जगांतच मोबदला इच्छित असेल, तर (लक्षांत ठेवा की) अल्लाहतआलाजवळ इहलोक आणि परलोक दोघांचा मोबदला प्राप्त आहे[३] आणि अल्लाहतआला सर्व काही ऐकणारा आणि चांगला पाहणारा आहे (१३४)

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوۡا كُوۡنُوۡا قَوّٰمِيۡنَ بِالۡقِسۡطِ شُهَدَآءَ لِلّٰهِ وَلَوۡ عَلٰٓى اَنۡفُسِكُمۡ اَوِ الۡوَالِدَيۡنِ وَالۡاَقۡرَبِيۡنَ ۚ اِنۡ يَّكُنۡ غَنِيًّا اَوۡ فَقِيۡرًا فَاللّٰهُ اَوۡلٰى بِهِمَا ۖ فَلَا تَتَّبِعُوا الۡهَوٰٓى اَنۡ تَعۡدِلُوۡا ۚ وَاِنۡ تَلۡوٗۤا اَوۡ تُعۡرِضُوۡا فَاِنَّ اللّٰهَ كَانَ بِمَا تَعۡمَلُوۡنَ خَبِيۡرًا ﴿١٣٥﴾

हे ईमानवाल्यांनो! न्यायावर मोठ्या मजबुतीने जमून रहा; आणि अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी खरी साक्ष देणारे बनून जा. जरी ती स्वत: तुमच्या विरूद्ध असेन; किंवा आपल्या आईबापांच्या किंवा नातेवाईक व प्रियजनांच्या[४] मग जर तो मनुष्य श्रीमंत असला आणि गरीब असला; तर दोघांबरोबर अल्लाहचा घनिष्ट संबंध आहे[५]. म्हणून तुम्ही (आपल्या) मनोकामनेच्या मागे पडून, न्याय न सोडून द्यावा[६]; आणि जर तुम्ही खोटे बोलाल किंवा तोंड चुकवाल[७], तर जाणून असा की, जे काही तुम्ही कराल अल्लाहतआला त्यापासून पूर्णपणे माहितगार आहे (१३५)

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوۡۤا اٰمِنُوۡا بِاللّٰهِ وَرَسُوۡلِهٖ وَالۡكِتٰبِ الَّذِىۡ نَزَّلَ عَلٰى رَسُوۡلِهٖ وَالۡكِتٰبِ الَّذِىۡۤ اَنۡزَلَ مِنۡ قَبۡلُ ؕ وَمَنۡ يَّكۡفُرۡ بِاللّٰهِ وَمَلٰۤٮِٕكَتِهٖ وَكُتُبِهٖ وَرُسُلِهٖ وَالۡيَوۡمِ الۡاٰخِرِ فَقَدۡ ضَلَّ ضَلٰلًاۢ بَعِيۡدًا ﴿١٣٦﴾

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहवर, त्याच्या रसूल (सल्ल.) वर आणि त्या पुस्तकावर जे त्याने आपल्या रसूल (सल्ल.) वर उतारले आहे; आणि त्या पुस्तकांवर जी याच्यापूर्वी त्याने अवतरीत केली आहेत; ईमान आणा[८]. जो मनुष्य अल्लाहतआलाला आणि त्याच्या देवदूताला आणि त्याच्या पुस्तकांना आणि त्याच्या पैगंबरांना आणि कयामतच्या दिवसाला नाकारेल; तर (तो) फारच दुरच्या मार्गभ्रष्टतेत जाऊन पडला (१३६)

१) हा तिसरा प्रकार आहे की, प्रयत्न करून सुद्धा निभाव लागत नसेल तर मग तलाक (घटस्पोट) च्या मार्गाने वेगळे होऊन जावे. शक्यता आहे की, पुरूषाला हव्या असलेल्या वैशिष्ट्यावाली पत्नी आणि स्त्रीला हव्या असलेल्या वैशिष्ट्यावाला पती मिळून जावा. इस्लाममध्ये तर 'तलाक' ला फारच नापसंद केले गेले आहे. एका हदीसमध्ये आहे, ''तलाक हलाल तर आहे परंतु हा असा हलाल आहे, जो अल्लाहला फारच नापसंद आहे.'' (अबुदाऊद मिशकात) असे असूनसुद्धा अल्लाहने याची परवानगी दिली आहे. यासाठी की, काही वेळा परिस्थिती अशा वळणावर पोहचते की, याशिवाय गत्यंतर रहात नाही. दोन्ही पक्षांचा चांगुलपणा यांतच असतो की, त्यांनी एक दुसऱ्यापासून वेगळे होऊन

जावे. तथापि वर उल्लेख केलेल्या हदीसने हे स्पष्ट होते की, हा अधिकार त्यावेळी उपयोगात आणला जावा, जेव्हा निभाव होण्याची कुठलीही शक्यता बाकी राहणार नाही.

**मलहुजा** – सदर हदीसला शेख अल्बानीने 'ज़ईफ' ठरविले आहे. (इर्वाऊल गलील) तथापि धर्मशास्त्रीय कारणाशिवाय तलाक नापसंद असण्यात वाद नाही.

२) हे अल्लाहतआलाच्या जबरदस्त आणि संपूर्ण सामर्थ्याचे प्रदर्शन आहे. जेव्हा की, एका दुसऱ्या जागी फरमाविले, ''आणि जर तुम्ही तोंड फिरविले, तर तो तुमच्याजागी आणखी कोणास घेऊन येईल, आणि ते तुमच्यासारखे नसतील'' (सू. मोहम्मद-३८)

३) जसे कोणी मनुष्य 'जिहाद', फक्त 'गनिमत' च्या संपत्तीच्या प्राप्तीसाठी करेल, तर ती किती मूर्खपणाची गोष्ट आहे. जेव्हा की अल्लाहतआला इहलोक आणि परलोक दोघांचा मोबदला देण्यास समर्थ आहे, तर मग त्याच्या जवळ एकच गोष्ट कां मागितली जावी? मनुष्याने दोन्ही गोष्टींचे इच्छुक का नसावे?

४) यात अल्लाहतआला, ईमानवाल्यांना, न्याय कायम करण्याला, आणि सत्याप्रमाणे साक्ष देण्याची ताकीद करीत आहे; जरी यामुळे त्यांना किंवा त्यांच्या आईबापांना आणि नातेवाईकांना नुकसानच सहन करावे लागेल, यासाठी की, सत्य, सर्वांवर सत्ता गाजविणारे आणि सर्वांहून श्रेष्ठ आहे.

५) म्हणजे कोण्या श्रीमंताच्या श्रीमंतीमुळे, सुट दिली न जावी; न कोण्या गरीबाच्या दारिद्याची भीती, तुम्हास सत्य गोष्ट सांगण्यापासून थांबवील; परंतु अल्लाह त्या दोघांपेक्षा, तुमच्या जास्त जवळ आहे; आणि श्रेष्ठ आहे.

६) म्हणजे मनोकामना आणि द्वेष तुम्हास न्याय करण्यापासून न थांबवो. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''तुम्हास कोण्या समाजाचे शत्रुत्व, या गोष्टीवर तयार न करो, की तुम्ही न्याय न करावा.'' (सू. माइदः-८)

७) 'तल्वू' 'लय्या' पासून आहे. जे हेरफेर आणि जाणून बुजून खोटे बोलण्याला म्हटले जाते. याचा अर्थ साक्षीत हेरफेर आणि बदल करणे आहे आणि आक्षेपाने अभिप्रेत साक्षीचे लपविणे, आणि तिचे सोडून देणे आहे. या दोन्ही गोष्टींपासून पण मना करण्यात आले आहे. या महावाक्यात न्याय करण्याची ताकीद आणि या करीता ज्या गोष्टीची आवश्यकता आहे, त्यांची व्यवस्था करण्याचा हुकूम देण्यात आला आहे. उदाहरणार्थ,(१) कुठल्याही परिस्थितीत न्याय करा; त्याच्यापासून केसाइतकेही ढळू नका. कोण्या निंदकाची निंदा आणि कोणी आणखी अडथळा आणणारा यांत अडथळा न बनवा. किंबहुना न्याय कायम करण्यामध्ये तुम्ही एक दुसऱ्याचे मददगार मित्र आणि पक्षकार बना! (२) फक्त अल्लाहची प्रसन्नता तुमच्या डोळ्या समोर असावी. कारण की, यामुळे तुम्ही हेरफेर, बदल आणि लपविणे या पासून स्वत:ला वाचवाल, आणि तुमचा निर्णय न्यायाच्या तराजूत पूर्ण उत्तीर्ण होईल. (३) न्याय निवाड्याचा मार, जरी तुमच्यावर किंवा तुमच्या आईबापांवर किंवा दुसऱ्या जवळच्या नातेवाईकांवर पण पडला; तरी तुम्ही त्याची पर्वा करू नका. आणि आपल्या आणि त्यांच्या नोतेसंबोधाला महत्त्व न देता न्यायाच्या मागणीला प्राधान्य द्या. (४) कोण्या श्रीमंताला त्याच्या श्रीमंतीमुळे, सुट देऊ नका आणि कोण्या गरीबाची त्याच्या दारिद्र्यामुळे भीती बाळगूं नका. कारण तोच (अल्लाहतआला) जाणतो की, त्या दोघांचे भले कशांत आहे ? (५) निर्णय करतांना मनोकामना, द्वेष आणि शत्रुत्व आडवी येता कामा नये. किंबहुना त्या सर्वांना नजरेआड करून नि:स्वार्थ न्याय करा.

न्यायदानाची ही काळजी ज्या समाजांत घेतली जाईल; तेथे सुख,शांती आणि अल्लाहकडून दया आणि बरकत अवतरीत होतील. सहाबा कराम ﷺ ने पण या मुद्याला चांगले समजावून घेतले होते. म्हणून ह.अब्दुल्लाह बिन रवाहा ﷺ च्या बाबतीत असे येते की, रसूल ﷺ नी त्यांना खैबरच्या यहूद्यांकडे पाठविले की, त्यांनी तेथील फळफळावळ आणि अन्नधान्याचा, सरासरी अंदाज घेऊन यावे. यहूद्यांनी त्यांना लाच घेण्याचे आमिष दाखविले की, त्यांनी काही नरमाईचे धोरण स्वीकारले, त्यांनी सांगितले की, ''अल्लाहची शपथ! मी त्याच्याकडून प्रतिनिधी बनून आलो आहे, जो या जगांत मला सर्वांत जास्त प्रिय आहे आणि तुम्ही मजजवळ सर्वांत जास्त नावडते आहांत; परंतु माझ्या प्रिय माणसाचे प्रेम आणि तुमचे शत्रुत्व, मला या गोष्टीवर उद्युक्त करू शकत नाही की, मी तुमच्या बाबतीत न्याय न करावा.'' हे ऐकूण ते म्हणाले '' या न्यायामुळे आकाश आणि पृश्वीची व्यवस्था कायम आहे.'' (तफसीर इब्ने कसीर)

८) ईमानवाल्यांना, ईमान आणण्याची ताकीद विचित्र गोष्ट नाही. परंतु ईमानाची परिपूर्णता त्याचेवर अडिग राहणे आणि त्याला मान्य करणे, याचा हुकूम आहे जसा, ''इहदेनस् सिरातल मुस्तकिम'' चा उद्देश आहे.

إِنَّ الَّذِينَ آمَنُوا ثُمَّ كَفَرُوا ثُمَّ آمَنُوا ثُمَّ كَفَرُوا ثُمَّ ازْدَادُوا كُفْرًا لَّمْ يَكُنِ اللَّهُ لِيَغْفِرَ لَهُمْ وَلَا لِيَهْدِيَهُمْ سَبِيلًا ﴿١٣٧﴾

**ज्या लोकांनी ईमान कबूल केल्यानंतर मग 'कुफ्र' केले, मग ईमान आणून मग 'कुफ्र' केले; मग आपल्या 'कुफ्र' मध्ये पुढेच गेले; अल्लाहतआला खचितच् त्यांना क्षमा करणार नाही. आणि तसेच त्यांना मार्गदर्शनाचा मार्ग समजाऊन देणार नाही[१] (१३७)**

بَشِّرِ الْمُنَافِقِينَ بِأَنَّ لَهُمْ عَذَابًا أَلِيمًا ﴿١٣٨﴾

**दांभिकांना या हुकूमाची बातमी पोहचवून द्या की, त्यांच्यासाठी वेदनादायक शिक्षा नक्कीच आहे (१३८)**

الَّذِينَ يَتَّخِذُونَ الْكَافِرِينَ أَوْلِيَاءَ مِن دُونِ الْمُؤْمِنِينَ ۚ أَيَبْتَغُونَ عِندَهُمُ الْعِزَّةَ فَإِنَّ الْعِزَّةَ لِلَّهِ جَمِيعًا ﴿١٣٩﴾

**ज्यांची ही स्थिती आहे की, मुसलमानांना सोडून काफिरांना दोस्त बनवतात[२]; काय त्यांच्याजवळ प्रतिष्ठेच्या शोधांत जातात? (तर लक्षात ठेवा) की प्रतिष्ठा तर संपूर्णपणे अल्लाहतआलाच्या आधिन आहे[३] (१३९)**

وَقَدْ نَزَّلَ عَلَيْكُمْ فِي الْكِتَابِ أَنْ إِذَا سَمِعْتُمْ آيَاتِ اللَّهِ يُكْفَرُ بِهَا وَيُسْتَهْزَأُ بِهَا فَلَا تَقْعُدُوا مَعَهُمْ حَتَّىٰ يَخُوضُوا فِي حَدِيثٍ غَيْرِهِ ۚ إِنَّكُمْ إِذًا مِّثْلُهُمْ ۗ إِنَّ اللَّهَ جَامِعُ الْمُنَافِقِينَ وَالْكَافِرِينَ فِي جَهَنَّمَ جَمِيعًا ﴿١٤٠﴾

**आणि अल्लाहतआला तुमच्याकडे आपल्या पुस्तकांतून हा आदेश अवतरीत करून चुकला आहे की, जेव्हा कधी तुम्ही कोण्या बैठकीवाल्यांना अल्लाहतआलाच्या महावाक्यांशी 'कुफ्र' करतांना आणि थट्टा करतांना ऐकाल, तर त्या जमावांत त्यांच्या सोबत बसू नका; जोपर्यंत की, ते त्याच्या शिवाय अन्य गोष्टीत लागून जाणार नाही; (नाही तर) तुम्ही सुद्धा त्यावेळी, त्यांच्याच सारखे आहात[४]. खचितच् अल्लाहतआला सर्व काफिरांना आणि सर्व दांभिकांना नरकाग्नीत एकत्रित करणार आहे (१४०)**

الَّذِينَ يَتَرَبَّصُونَ بِكُمْ فَإِن كَانَ لَكُمْ فَتْحٌ مِّنَ اللَّهِ قَالُوا أَلَمْ نَكُن مَّعَكُمْ وَإِن كَانَ لِلْكَافِرِينَ نَصِيبٌ قَالُوا أَلَمْ نَسْتَحْوِذْ عَلَيْكُمْ وَنَمْنَعْكُم مِّنَ الْمُؤْمِنِينَ ۚ فَاللَّهُ يَحْكُمُ بَيْنَكُمْ يَوْمَ الْقِيَامَةِ ۗ وَلَن يَجْعَلَ اللَّهُ لِلْكَافِرِينَ عَلَى الْمُؤْمِنِينَ سَبِيلًا ﴿١٤١﴾

**हे लोक तुमच्या कामाच्या परिणामाची प्रतीक्षा करीत आहेत. मग जर अल्लाहतआला तुम्हास विजय देईल; तर हे म्हणतात की, काय आम्ही तुमचे साथीदार नाहीत? आणि जर काफिरांना थोडेसे वर्चस्व प्राप्त होईल, तर त्यांना म्हणतात की, आम्ही तुम्हावर वरचढ न होऊ लागलो होतो; आणि काय आम्ही तुम्हास मुसलमानांपासून वाचविले नव्हते?[५] मग 'कयामत' मध्ये अल्लाहतआला स्वत: तुमच्यात निर्णय करून देईल[६] आणि अल्लाहतआला काफिरांना ईमानवाल्यावर (कुठल्याही प्रकारे वरचढ रहाण्याचा) मार्ग दाखविणार नाही[७] (१४१)**

إِنَّ الْمُنَافِقِينَ يُخَادِعُونَ اللَّهَ وَهُوَ خَادِعُهُمْ وَإِذَا قَامُوا إِلَى الصَّلَاةِ قَامُوا كُسَالَىٰ يُرَاءُونَ النَّاسَ وَلَا يَذْكُرُونَ اللَّهَ إِلَّا قَلِيلًا ﴿١٤٢﴾

**नि:संशय दांभिकलोक अल्लाहला धोका देत आहे; आणि तो त्यांना धोका देण्याचा बदला देणार आहे[८]. आणि जेव्हा ते नमाजीला उभे राहतात; तेव्हा मोठ्या आळसावलेल्या स्थितीत उभे राहतात[९]. फक्त लोकांना दाखवतात[१०] आणि अल्लाहचे स्मरण तर नाममात्र करतात[११] (१४२)**

१) काही भाष्यकारांनी याच्याने अभिप्रेत यहूदी घेतले आहेत. यहूद्यांनी ह.मूसा عليه السلام वर ईमान आणले, परंतु ह.अुजैर عليه السلام ला नाकारले. मग ह.अुजैर عليه السلام वर ईमान आणले तर ह.इसा عليه السلام ला नाकारले. मग 'कुफ्र' मध्ये वाढतच चालले गेले, येथपावेतो की, ह.मोहम्म्द ﷺ च्या पैगंबरीला पण नाकारले आणि काहींनी याच्याने अभिप्रेत दांभिक घेतले आहेत. कारण की त्यांचा उद्देश मुसलमानांना नुकसान पोहचविणे होता. म्हणून ते वारंवार आपल्या मुसलमानीचे ढोंग रचत असत. सरशेवटी कुफ्र आणि मार्ग भ्रष्टतेत इतके पुढे गेले की, याची मार्गदर्शनाची आशा पार मावळून गेली.

२) ज्याप्रमाणे सू.बकर: च्या सुरवातीला येऊन चुकले आहे की दांभिक, काफिरांजवळ जाऊन असेच सांगत असत की, आम्ही तर वास्तविक तुमचेच साथीदार आहोत; मुसलमानांशी तर आम्ही अशीच थट्टा मस्करी करतो.

३) म्हणजे प्रतिष्ठा, काफिरांबरोबर दोस्ती आणि प्रेम केल्याने मिळणार नाही; कारण की हे तर अल्लाहच्या अधिकारात आहे. आणि तो ही प्रतिष्ठा आपल्या मानणाऱ्यांनाच देत असतो. दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जो मनुष्य प्रतिष्ठा प्राप्त करू इच्छित असेल, तर अल्लाहतआलालाच सारी प्रतिष्ठा आहे.'' (सू. फातिर-१०) आणि सांगितले,'' इज्जत अल्लाहसाठी आहे, त्याच्या पैगंबरासाठी आहे आणि मोमिनासाठी आहे. परंतु दांभिक लोक हे समजत नाही.''

(सू. अलमुनाफिकून-८) म्हणजे ते ढांभिकपणामुळे आणि काफिरांबरोबर मैत्री करून इज्जत प्राप्त करू इच्छितात. वास्तविक पहाता, ही पद्धत अप्रतिष्ठेची आणि मानहानीची आहे; प्रतिष्ठेची नाही.
४) म्हणजे मना करून सुद्धा जर तुम्ही अशा बैठकांमध्ये जेथे अल्लाहच्या महावाक्यांची टर उडविली जाते, बसाल, आणि त्याला विरोध करणार नाही, तर तुम्हीं सुद्धा पापात त्यांच्यात सहभागी व्हाल. जसे एका हदीसमध्ये येते की, ''जो मनुष्य अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर विश्वास ठेवतो, त्याने त्या आमंत्रणात सहभागी होऊ नये; ज्यांत मद्याचा उपयोग केला जातो.'' (मुसनद अहमद) याच्याने ठाऊक झाले की, अशा बैठकीत आणि संमेलनात सहभागी होणे, ज्यांत अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशाची जबानी किंवा कृतीने टिंगल केली जात असेल, जसे आजकल श्रीमंत फॅशनेबल आणि पाश्चात्त्यांचे अनुकरण करणाऱ्या लोकांमध्ये सर्व साधारण असेच होते. किंवा लग्न समारंभ किंवा वाढदिवसाच्या समारंभात केले जाते. हे सक्त गुनाह आणि हराम आहे. इमाम शौकानी म्हणतात की, त्यांच्यातच धडे आणि शिक्षण देणारे ते वर्ग पण येतात, जेथे अंधानुकरणाच्या तुलनेत कुरआन आणि हदीसे नबवी ﷺ चे खंडन आणि त्याची टिंगल केली जाते. म्हणून अशा प्रकारच्या सर्व चर्चित बैठकांमध्ये भाग घेणे फारच मोठे पाप आहे.''इन्नकुम् इजन मिस्लुहुम'' कुरआनाची धमकी, ईमानवाल्यांमध्ये थरकाप उडविण्यांस पुरेशी आहे; शर्त एवढीच की त्यांच्या मनांत ईमान असावे.
५) म्हणजे आम्ही तुमच्यावर वरचढ होत होतो, परंतु तुम्हाला आपला मित्र समजून सोडून दिले आणि मुसलमानांची संगत सोडून आम्ही तुम्हास मुसलमानांकडून वाचविले. अर्थ असा की, तुम्हाला विजय आमच्या या ढोगल्या पॉलिसीच्या परिणामामुळे झाला आहे. जी आम्ही उघडरित्या मुसलमानांत सामील होऊन, अंगिकारली. परंतु पडद्याआडून त्यांना नुकसान पोहचविण्यांत कुठलीही कुचराई आणि कमी केली नाही. म्हणूनच तुम्ही त्यांच्यावर वरचढ राहिलात.
६) म्हणजे जगांत तर तुम्ही धोका आणि फसवणूकीने तात्कालिक स्वरूपांत काही यश तर मिळवून घेतले; परंतु कयामतच्या दिवशी अल्लाहतआलाचा निर्णय, त्या आतिल भावना आणि रंग ढंगाच्या प्रकाशात होईल. ज्यांना तुम्ही आपल्या मनांत लपवत होता. यासाठी की अल्लाहतआला मनांतील गुप्त गोष्टींना पण खूप चांगल्याप्रकारे जाणतो. मग यावर तो जी शिक्षा देईल, तेव्हा माहित होईल की जगात ढांभिकपणा अंगिकारून फारच घाट्याचा सौदा केला होता; ज्यावर नरकाग्नीची नित्य राहणारी शिक्षा भोगावी लागेल. अआजनल्लाहु मिनहु!
७) म्हणजे वर्चस्व देणार नाही. याचे निरनिराळे अर्थ घेण्यांत आले आहेत.
(अ)..ईमानवाल्यांचे हे वर्चस्व कयामतच्या दिवशी असेल (ब)..पुरावा आणि तर्काच्या आधारे काफिर मुसलमानांवर वर्चस्व प्रस्तापित करू शकत नाही (क)..काफिरांचे असे वर्चस्व प्रस्तापित होऊ शकणार नाही की, मुसलमानांची संपत्ती आणि दबदबा बिलकुलच नष्ट होऊन जाईल. आणि ते चुकीच्या शब्दाप्रमाणे जगाच्या नकाशावरून मिटवून टाकण्यांत येतील. एका सही हदीसीने सुद्धा याचे समर्थन होते ''जोपर्यंत मुसलमान आपल्या धर्मावर कार्यरत, निरर्थक गोष्टींकडून नाराज, वाईट गोष्टींना मना करणारे राहतील, काफिर त्यांच्यावर वर्चस्व गाजवूंशकणार नाही.'' इमाम इब्ने अरबी म्हणतात, की, हा सगळ्यात चांगला अर्थ आहे; कारण की, अल्लाहचा फरमान आहे, ''आणि जी संकटे तुमच्यावर येतात; ती तुमच्या कर्मांमुळे आहेत.'' (सू. शूरा-३०) (फत्हुल कदीर) म्हणजे जणू मुसलमानांचा पराजय, हा त्यांच्या कोताहीचा परिणाम आहे.
८) याचे थोडक्यात स्पष्टीकरण. सू.बकर: च्या सुरवातीला येऊन चुकले आहे.
९) नमाज इस्लामचा महत्त्वाचा स्तंभ आणि सर्वांत उत्कृष्ट अनिवार्य कर्म आहे. आणि तरी सुद्धा ते यात आळस आणि सुस्ती दाखवत असत; कारण की, त्यांचे अंत:करण ईमान, अल्लाहचे भय, आणि निखालसतेने रिक्त होते. हेच कारण होते की, विशेष करून इशा आणि फजरची नमाज त्यांना फार जड वाटत असे. जसे की, नबी ﷺ चे फर्मान आहे, ''मुनाफिक वर इशा आणि फज्रची नमाज फार भारी आहे.'' (स.बुखारी, स.मुस्लीम)
१०) ही नमाज पण ते फक्त दाखविण्यासाठी पढत होते की, मुसलमानांना धोका द्यावा.
११) अल्लाहचे स्मरण फक्त नांवापुरते करतात. किंवा नमाज संक्षिप्त सारखी पढतात. जेव्हा नमाज निखालस वृत्ती, अल्लाहचे भय आणि विनम्रता काकुळतीने रिक्त असेल, तर समाधानकारक नमाजचे अदा करणे फारच दुरापास्त आहे. (सू. बक़र:-४५) ने स्पष्ट आहे. हदीसमध्ये नबी ﷺ नी फर्माविले, ''ही मुनाफिकची नमाज आहे, ही मुनाफीकची नमाज आहे, ही मुनाफीकची नमाज आहे की, बसून सूर्याची प्रतीक्षा करतो, येथ पावेतो की, सूर्य शैतानाच्या दोन शिंगा दरम्यान (अस्ताच्या जवळ) होऊन जातो, तर उठतो, आणि चार चोची मारून घेतो (स.मुस्लीम)

مُّذَبْذَبِيْنَ بَيْنَ ذٰلِكَ ۖ لَآ اِلٰى هٰٓؤُلَآءِ وَلَآ اِلٰى هٰٓؤُلَآءِ ۭ وَمَنْ يُّضْلِلِ اللّٰهُ فَلَنْ تَجِدَ لَهٗ سَبِيْلًا ﴿١٤٣﴾

**ते मध्यंतरीच घुटमळत पडले आहेत. न पूर्ण त्यांच्याकडे न खऱ्या अर्थाने यांचेकडेस[१] आणि ज्याला अल्लाहतआला मार्ग भ्रष्टतेत टाकून देईल, तर आपणास त्यांच्यासाठी कुठलाही मार्ग सापडणार नाही (१४३)**

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَتَّخِذُوا الْكٰفِرِيْنَ اَوْلِيَآءَ مِنْ دُوْنِ الْمُؤْمِنِيْنَ ۭ اَتُرِيْدُوْنَ اَنْ تَجْعَلُوْا لِلّٰهِ عَلَيْكُمْ سُلْطٰنًا مُّبِيْنًا ﴿١٤٤﴾

**हे ईमानवाल्यांनो! मुसलमानांना सोडून काफिरांना मित्र बनवू नका, काय तुम्ही असे इच्छितात की, आपल्यावर अल्लाहतआलाचा ढळढळीत पुरावा कायम करून घ्यावा[२] (१४४)**

اِنَّ الْمُنٰفِقِيْنَ فِي الدَّرْكِ الْاَسْفَلِ مِنَ النَّارِ ۚ وَلَنْ تَجِدَ لَهُمْ نَصِيْرًا ﴿١٤٥﴾

**दांभिक लोक तर खचितच् नरकाग्नीच्या सर्वांत खालच्या तबक्यात जातील[३] अशक्य आहे की, तू त्यांचा कोणी मददगार पावशील (१४५)**

اِلَّا الَّذِيْنَ تَابُوْا وَاَصْلَحُوْا وَاعْتَصَمُوْا بِاللّٰهِ وَاَخْلَصُوْا دِيْنَهُمْ لِلّٰهِ فَاُولٰۗىِٕكَ مَعَ الْمُؤْمِنِيْنَ ۭ وَسَوْفَ يُؤْتِ اللّٰهُ الْمُؤْمِنِيْنَ اَجْرًا عَظِيْمًا ﴿١٤٦﴾

**हां! परंतु जे पश्चात्ताप व्यक्त करतील, आणि (आपल्यांत) सुधारणा करतील, आणि अल्लाहतआलावर संपूर्ण भरोसा ठेवतील आणि निव्वळ अल्लाहसाठीच धार्मिक वृत्ती बाळगतील, तर हे लोक मोमिनाबरोबर आहेत[४]; अल्लाहतआला मोमिनांना फार मोठे प्रतिफळ देईन (१४६)**

مَا يَفْعَلُ اللّٰهُ بِعَذَابِكُمْ اِنْ شَكَرْتُمْ وَاٰمَنْتُمْ ۭ وَكَانَ اللّٰهُ شَاكِرًا عَلِــيْمًا ﴿١٤٧﴾

**अल्लाहतआला तुम्हास शिक्षा देऊन काय करेल, जर तुम्ही आभार मानत रहाल, आणि ईमानवाले बनून रहाल[५]. अल्लाहतआला फारच गुणग्राहक आणि ज्ञान बाळगणारा आहे[६] (१४७)**

१) काफिरांजवळ जातात, तर त्यांचे बरोबर आणि मुसलमानांजवळ येतात तर त्यांचे बरोबर मैत्री आणि संबंधांचे प्रदर्शन करतात. उघडपणे आणि गुप्तपणे ते मुसलमानांबरोबर नाहीत की, काफिरांबरोबर नाहीत. उघड त्यांचे मुसलमानांबरोबर आहे; तर अंदरूनी ते काफिरांबरोबर आहेत. आणि काही दांभिक तर, कुफ्र आणि ईमानच्या दरम्यान आश्चर्य आणि गोंधळात पडल्यासारखे असत. नबी ﷺ चा फर्मान आहे, ''मुनाफिकचे उदाहरण त्या बकरी सारखे आहे, जी समागमाकरीता दोन कळपादरम्यान बैचेन होऊन फिरते (बकऱ्याच्या शोधात) कधी एका कळपाकडे जाते, कधी दुसऱ्याकडे.'' (स.मुस्लीम किताबुल मुनाफिकीन)

२) म्हणजे अल्लाहतआलाने तुम्हास काफिरांशी दोस्ती करण्यापासून मना केले आहे. आता जर तुम्ही मैत्री केली, तर याचा अर्थ असा आहे की, तुम्ही अल्लाहला तो पुरावा देत आहात की, तो तुम्हाला पण शिक्षा देऊ शकेल. (म्हणजे अल्लाहच्या मर्जीविरूध्द आणि आज्ञाभंगाच्या कारणाने)

३) नरकाग्नीचे सर्वांत खालचे दालन 'हाविय:' म्हणण्यात येते. अआजनल्लाहु मिनहा! मुनाफिकांच्या उल्लेखित, सवयी आणि वैशिष्ट्यांपासून आम्हा सर्व मुसलमानांस अल्लाहतआला वाचवो! (आमीन)

४) म्हणजे दांभिकांमधून जो या चार गोष्टींचा निखालस वृत्तीने अंगिकार करून घेईल, तो नरकाग्नीत जाण्याच्या ऐवजी स्वर्गात ईमानवाल्यांबरोबर राहील.

५) आभार प्रदर्शनाचा अर्थ आहे की, अल्लाहच्या आज्ञाप्रमाणे वाईट कामापासून वाचणे आणि चांगल्या कामांचे करणे हे जणूअल्लाहतआलाच्या देणग्यांचे कृतीने आभार मानणे आहे. आणि ईमानाने अभिप्रेत अल्लाहला एक मानणे, त्याच्या स्वामित्वाला मान्य करणे. यावर आणि शेवटचे पैगंबर (म्हणजे आता यापुढे कोणीही पैगंबर येणार नाहीत) ह.मोहम्मद मुस्तफा ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणणे आहे.

६) म्हणजे जो याचे आभार मानेल, आणि गुणग्राहकता दाखवील, जो मनापासून ईमान आणेन, तो (अल्लाह) त्याला जाणून घेईल; आणि याच्याप्रमाणे पुण्याचा मोबदला जो परलोकात मिळेल (जज़ा) त्याला बहाल करण्यात येईल.

لَا يُحِبُّ اللّٰهُ الْجَهْرَ بِالسُّوْٓءِ مِنَ الْقَوْلِ اِلَّا مَنْ ظُلِمَ ؕ وَ كَانَ اللّٰهُ سَمِيْعًا عَلِيْمًا ﴿١٤٨﴾

वाईट गोष्टींना मोठ्या आवाजात व्यक्त करणे अल्लाहतआलाला पसंत नाही; परंतु अन्यायपीडिताला परवानगी आहे[१] आणि अल्लाहतआला खूप ऐकणारा व जाणणारा आहे ﴿१४८﴾

اِنْ تُبْدُوْا خَيْرًا اَوْ تُخْفُوْهُ اَوْ تَعْفُوْا عَنْ سُوْٓءٍ فَاِنَّ اللّٰهَ كَانَ عَفُوًّا قَدِيْرًا ﴿١٤٩﴾

जर तुम्ही कुठल्या पुण्याच्या कामाला जाहीरपणे कराल किंवा गुप्तपणे किंवा कुठल्या वाईटाकडे दुर्लक्ष कराल[२], तर मग अल्लाहतआला पूर्ण क्षमा करणारा, आणि सर्व सामर्थ्यवान आहे ﴿१४९﴾

اِنَّ الَّذِيْنَ يَكْفُرُوْنَ بِاللّٰهِ وَ رُسُلِهٖ وَ يُرِيْدُوْنَ اَنْ يُّفَرِّقُوْا بَيْنَ اللّٰهِ وَ رُسُلِهٖ وَ يَقُوْلُوْنَ نُؤْمِنُ بِبَعْضٍ وَّ نَكْفُرُ بِبَعْضٍ ۙ وَّ يُرِيْدُوْنَ اَنْ يَّتَّخِذُوْا بَيْنَ ذٰلِكَ سَبِيْلًا ﴿١٥٠﴾

नि:संशय जे लोक अल्लाहतआला बरोबर आणि त्याच्या पैगंबराबरोबर, 'कुफ्र' करतात, आणि जे लोक असे इच्छितात की, अल्लाह आणि त्याच्या पैगंबरामध्ये फरक ठेवावा, आणि काही लोक म्हणतात की, काही पैगंबरावर तर आमचे ईमान आहे; आणि काहीवर नाही; आणि इच्छितात की याच्या आणि त्याच्या दरम्यान काही मार्ग काढावा ﴿१५०﴾

اُولٰٓئِكَ هُمُ الْكٰفِرُوْنَ حَقًّا ۚ وَ اَعْتَدْنَا لِلْكٰفِرِيْنَ عَذَابًا مُّهِيْنًا ﴿١٥١﴾

विश्वास ठेवा की, हे सर्व लोक खरे 'काफिर' आहेत[३] आणि काफिरांसाठी आम्ही अपमानास्पद शिक्षा तयार करून ठेवली आहे ﴿१५१﴾

१) धर्मशास्त्राने ताकीद केली आहे की, कोणात काही वाईट पहाल, तर त्याची चर्चा करू नका. किंबहुना एकातात त्याला समजवा. त्याचप्रमाणे जाहीरपणे आणि मोठ्या आवाजाने वाईट बोलणे पण नावडते कर्म आहे. एकतर वाईटकर्म करणे, तसे पण मना आहे, जरी परद्याच्या आंतच का असेना. दुसरे असे की, त्याला जगजाहीररीत्या केले जावे, हे आणखी एक अपराध आहे. आणि यामुळे त्याचा वाईटपणाचा अपराध दुप्पट किंवा दहापट पण होऊ शकतो. कुरआनाचे शब्द चर्चित दोन्ही प्रकाराच्या वाईटपणाला जाहीर करण्याला मना करतात; आणि यात हे पण दाखल आहे की कोण्या माणसाला त्याने केलेल्या किंवा न केलेल्या कृत्यावर बरे वाईट बोलले जावे. परंतु याला एक अपवाद आहे की, जालिमाच्या जुलूमाला तुम्ही लोकांपुढे वर्णन करू शकतात. ज्याच्याने एक फायदा हा अपेक्षित आहे की, कदाचित् त्याने जुलूम परावृत्त होऊन जावे. किंवा याच्या भरपाईचा प्रयत्न करावा. दुसरा फायदा हा आहे की, लोक त्याच्यापासून स्वत:ला वाचवतील. हदीसमध्ये येते की, एक मनुष्य नबी ﷺ च्या सेवेत हजर झाला. आणि सांगितले मला माझा शेजारी त्रास देतो; आपण ﷺ नी त्याला आज्ञाविले, ''तुम्ही आपले सामान काढून रस्त्यावर ठेवून द्या.'' त्याने असेच केले. पुढे असे झाले की, जो पण तेथून जात असे, त्याला विचारी, तेव्हा तो शेजाऱ्याच्या अन्यायपूर्ण वागणूकीचे वर्णन करीत असे; हे ऐकूण तेथून जाणारा प्रत्येकजण, त्याचा धिक्कार आणि निर्भत्सना करीत असे. शेजाऱ्याने ही परिस्थिती पाहून माफी मागितली; आणि भविष्यकाळांत त्रास न देण्याचा निर्णय घेतला आणि त्याला त्याचे सामान आत ठेवण्याची विनंती केली. (सुनन अबुदाऊद किताबुल अदब)

२) कोणी मनुष्य कोणाबरोबर अन्याय किंवा वाईट करण्याचा प्रयत्न करील, तर धर्मशास्त्राने एका मर्यादेपर्यंत बदला घेण्याची परवानगी दिली आहे; ज्या मर्यादेपर्यंत त्याच्यावर जुलूम झाला आहे. ''आपसांत शिवीगाळ करणारी दोन माणसे, जे काही म्हणतील, याचे पाप ज्याने प्रथम पुढाकर घेतला, त्याचेवर आहे (या अटीवर की) अन्यायपीडिताने (म्हणजे ज्याला प्रथम शिवी दिली गेली; आणि त्याने उत्तरात शिवी दिली) अति न करावी.'' (स.मुस्लीम) परंतु बदला घेण्याच्या परवानगी बरोबर क्षमा आणि विसरून जाण्याला पण जास्त पसंती देण्यात आली आहे; कारण की, अल्लाहतआला स्वत: पूर्ण सामर्थ्यवान असूनसुद्धा क्षमेने आणि माफीने काम करतो. म्हणून सांगितले, ''वाईटाचा बदला त्याच्याच सारख्या वाईटाने आहे; परंतु जो क्षमा करेल आणि सुधारणा करून घेईल, त्याच्या मोबदल्याची जबाबदारी अल्लाहवर आहे.'' (सू. शूरा-४०) आणि हदीसमध्येपण आहे, क्षमा करून दिल्याने अल्लाहतआला प्रतिष्ठेत वाढच करूद देतो.'' (स.मुस्लीम)

३) ग्रंथधारी लोकांच्या बाबतीत पहिले येऊन चुकले आहे की, ते काही पैगंबरांना मानत आणि काहींना मानत नसत. जसे यहूद्यांनी ह.ईसा عليه السلام व मोहम्मद रसूल ﷺ ला, आणि ख्रिस्त्यांनी ह.मोहम्मद रसूल ﷺ ला नाकारले. अल्लाहतआलाने फरमाविले की, पैगंबरामध्ये عليهم السلام भेदाभेद करणारे पक्के काफिर आहेत.

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا بِاللّٰهِ وَرُسُلِهٖ وَلَمْ يُفَرِّقُوْا بَيْنَ
اَحَدٍ مِّنْهُمْ اُولٰٓئِكَ سَوْفَ يُؤْتِيْهِمْ اُجُوْرَهُمْ ؕ وَكَانَ
اللّٰهُ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿١٥٢﴾

**आणि जे लोक अल्लाहवर आणि त्याच्या सर्व पैगंबरांवर ईमान आणतात; आणि त्यांच्यातून कोणांत (भेदा) भेद करीत नाहीत; हेच आहेत, ज्यांना अल्लाह पूर्ण मोबदला देईल[१] आणि अल्लाह मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१५२)**

يَسْئَلُكَ اَهْلُ الْكِتٰبِ اَنْ تُنَزِّلَ عَلَيْهِمْ كِتٰبًا مِّنَ
السَّمَآءِ فَقَدْ سَاَلُوْا مُوْسٰٓى اَكْبَرَ مِنْ ذٰلِكَ فَقَالُوْٓا
اَرِنَا اللّٰهَ جَهْرَةً فَاَخَذَتْهُمُ الصّٰعِقَةُ بِظُلْمِهِمْ ۚ
ثُمَّ اتَّخَذُوا الْعِجْلَ مِنْ بَعْدِ مَا جَآءَتْهُمُ الْبَيِّنٰتُ
فَعَفَوْنَا عَنْ ذٰلِكَ ۚ وَاٰتَيْنَا مُوْسٰى سُلْطٰنًا مُّبِيْنًا ﴿١٥٣﴾

**आपणांस हे ग्रंथधारी लोक, मागणी करतात की, आपण त्यांच्याजवळ कोणी आकाशी ग्रंथ आणावा[२]. मूसा (अ.) जवळ तर त्यांनी याच्यापेक्षा फार मोठी मागणी केली होती, की आम्हास उघड उघड अल्लाहतआलाला दाखवून दे; बस त्यांच्या या जुलूमांमुळे त्यांना कडाक्याच्या वीजेने येऊन गाठले; मग यावर सुद्धा की, यांचेजवळ पुष्कळ निशाण्या येऊन चुकल्या होत्या; यांनी वासराला आपला उपास्य बनवून घेतला, परंतु आम्ही हे पण क्षमा करून टाकले; आणि आम्ही मूसा (अ.) ला उघड वर्चस्व आणि स्पष्ट निशाणी दिली (१५३)**

وَرَفَعْنَا فَوْقَهُمُ الطُّوْرَ بِمِيْثَاقِهِمْ وَقُلْنَا لَهُمُ
ادْخُلُوا الْبَابَ سُجَّدًا وَّقُلْنَا لَهُمْ لَا تَعْدُوْا فِي السَّبْتِ
وَاَخَذْنَا مِنْهُمْ مِّيْثَاقًا غَلِيْظًا ﴿١٥٤﴾

**आणि त्यांचे वचन घेण्यासाठी आम्ही त्यांच्या डोक्यांवर तूर पर्वताला आणून उभे केले. आणि त्यांना हुकूम दिला की सजदा करीत करीत दरवाज्यात दाखल व्हा. आणि हे पण सांगितले की, शनिवारच्या दिवसाच्या (पालनात) तुम्ही आमच्या हुकूमांचे उल्लंघन करू नका. आणि आम्ही त्याच्याकडून कठिणाहून कठीण वचन घेतले (१५४)**

فَبِمَا نَقْضِهِمْ مِّيْثَاقَهُمْ وَكُفْرِهِمْ بِاٰيٰتِ اللّٰهِ وَقَتْلِهِمُ
الْاَنْۢبِيَآءَ بِغَيْرِ حَقٍّ وَّقَوْلِهِمْ قُلُوْبُنَا غُلْفٌ ؕ بَلْ طَبَعَ
اللّٰهُ عَلَيْهَا بِكُفْرِهِمْ فَلَا يُؤْمِنُوْنَ اِلَّا قَلِيْلًا ﴿١٥٥﴾

**(ही शिक्षा होती.) त्यांच्या वचनभंगाच्या कारणाची आणि अल्लाहच्या हुकूमांना नाकारण्याची आणि अल्लाहच्या पैगंबरांना नाहक ठार करण्याची[३] आणि या कारणाने की, हे म्हणतात की आमच्या अंत:करणावर आच्छादन आहे; वास्तविक खरे पाहता, त्यांच्या 'कुफ्र' मुळे, अल्लाहतआलाने त्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून टाकली आहे. म्हणून हे फारच थोडे ईमान आणतात (१५५)**

وَّبِكُفْرِهِمْ وَقَوْلِهِمْ عَلٰى مَرْيَمَ بُهْتَانًا عَظِيْمًا ﴿١٥٦﴾

**आणि यांच्या 'कुफ्र' मुळे आणि ह.मर्यम (अ.) वर खोटा आळ घेण्यामुळे[४] (१५६)**

१) ही ईमानदारांची पद्धत दाखविली की, ते सर्व पैगंबरावर ईमान राखतात. ज्याप्रमाणे मुसलमान आहेत की, ते कोणत्याही पैगंबरांना नाकारत नाही. या महावाक्यातपण 'सर्वधर्मसमभाव' चे खंडन होते; ज्यांच्या मानणाऱ्यांजवळ ह. मोहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणणे आवश्यक नाही. आणि ते त्या गैरमुस्लीमांनापण मुक्ती मिळवणारे समजतात; जे आपल्या समजुतीप्रमाणे अल्लाहवर ईमान ठेवतात. परंतु कुरआनाच्या या महावाक्याने स्पष्ट करून दिले आहे की, अल्लाहवर ईमानाबरोबरच ह. मोहम्मद ﷺ च्या रिसालत (पैगंबरी) वर पण ईमान आणणे आवश्यक आहे. जर या शेवटच्या पैगंबरीला नाकारले जाईल. तर त्याच्या नाकारण्याबरोबर अल्लाहवर ईमान भरोशाच्या लायक नाही आणि नाकबूल आहे. (कृपया पहावे सू.बकर: चे महावाक्य क्र.६२ चा समास)

२) म्हणजे ज्याप्रमाणे मूसा عليه السلام तूर पर्वतावर गेले; आणि पाट्यांवर लिहिलेले तौरात घेऊन आले; अशाच प्रकारे आपणसुद्धा आकाशांवर जाऊन लिहिलेले कुरआन शरीफ घेऊन यावे. ही मागणी निव्वळ वंश श्रेष्ठत्व आणि छिद्रान्वेषण करण्याच्या आधारावर होती.

३) मामल्याचे वर्णन असे होईल, ''फबिनकज़िहिम् मिसाकहूम लअन्नाहुम'' म्हणजे आम्ही यांचे वचनाला तोडून टाकण्यामुळे, अल्लाहच्या निशाण्यांना नाकारण्यामुळे, आणि पैगंबरांना ठार केल्यामुळे, इत्यादी कारणांमुळे यांना शापित केले; किंवा शिक्षा दिली.

४) याच्याने अभिप्रेत युसूफ नज्जार बरोबर ह.मर्यमवर वाईट कृत्याचा आळ आहे. आज सुद्धा काही तत्त्वज्ञानी या मोठ्या आळाला 'घडलेली घटना' ठरविण्यावर ठाम आहेत. आणि म्हणतात यूसुफ नज्जार (नाऊजोबिल्लाह) ह.ईसा عليه السلام चा बाप होता. आणि अशाप्रकारे ह.ईसा عليه السلام च्या बापाशिवाय चमत्काराने जन्मण्यालापण नाकारतात.

وَّ قَوْلِهِمْ اِنَّا قَتَلْنَا الْمَسِيْحَ عِيْسَى ابْنَ مَرْيَمَ رَسُوْلَ اللّٰهِ ۚ وَمَا قَتَلُوْهُ وَمَا صَلَبُوْهُ وَلٰكِنْ شُبِّهَ لَهُمْ ؕ وَاِنَّ الَّذِيْنَ اخْتَلَفُوْا فِيْهِ لَفِيْ شَكٍّ مِّنْهُ ؕ مَا لَهُمْ بِهٖ مِنْ عِلْمٍ اِلَّا اتِّبَاعَ الظَّنِّ ۚ وَمَا قَتَلُوْهُ يَقِيْنًا ﴿١٥٧﴾

**आणि असे म्हणण्यामुळे की, आम्ही अल्लाहचे पैगंबर मसीह ईसा बिन मर्यम (अ.) ला ठार करून टाकले; वास्तविक न तर त्यांनी त्यांना ठार केले, न सुळावर चढविले[१]. परंतु त्यांना तसा आभास झाला[२]; विश्वास ठेवा की, ईसा (अ.) च्या बाबतीत, मतभेद करणारे, त्यांच्याबाबतीत संशयांत पडले आहेत. त्यांना याची खात्री नाही, केवळ कल्पनेमागे धांव घेत आहे[३]. इतकी खात्री आहे की, त्यांनी त्याला ठार केले नाही** ﴿१५७﴾

بَلْ رَّفَعَهُ اللّٰهُ اِلَيْهِ ؕ وَكَانَ اللّٰهُ عَزِيْزًا حَكِيْمًا ﴿١٥٨﴾

**परंतु अल्लाहतआलाने त्यांना आपल्याकडे उचलून घेतले[४]. आणि अल्लाह मोठा सामर्थ्यवान आणि युक्तीवान आहे[५]** ﴿१५८﴾

१) याच्याने स्पष्ट होऊन गेले की, ह.ईसा عليه السلام ला ठार करण्यात यहूदी यशस्वी झाले नाहीत; तसेच त्यांना सुळावर चढवण्यात देखील यशस्वी झाले नाहीत; जशी की त्यांची योजना होती. जसे की,सू.आले इमरान चे महावाक्य क्र.५५ च्या समासात थोडक्यात खुलासा येऊन चुकला आहे.

२) याचा अर्थ असा आहे की, जेव्हा ह.ईसा عليه السلام ला यहूद्यांच्या कारस्थानाचा सुगावा लागला, तर त्यांनी आपल्या हवारींना, ज्यांची संख्या १२ किंवा १७ होती, जमा केले, आणि सांगितले, की तुमच्यातून कोणी मनुष्य माझ्या ठिकाणी ठार होण्यास तयार आहे का? कारण की, अल्लाहतआलाकडून त्याचा चेहरा मोहरा माझ्या सारखा करून दिला जावा. एक तरूण यासाठी तयार झाला. नंतर ह.ईसा عليه السلام ला तेथून आकाशावर उचलून घेण्यांत आले. नंतर यहूदी आले आणि त्यांनी या तरूणाला घेऊन जाऊन सुळावर चढवून दिले; ज्याचा ह.ईसा عليه السلام सारखा चेहरा मोहरा बनवून देण्यात आला होता. यहूदी असेच समजत राहिले की, आम्ही ह.ईसा عليه السلام ला सुळावर चढविले आहे. वास्तविक ह.ईसा عليه السلام तेथे उपस्थितच नव्हते. ते जिवंत सदेह आकाशावर उचलले जाऊन चुकले होते. (इब्ने कसीर व फत्हुल कदीर)

३) ह.ईसा عليه السلام च्या सारखा चेहरा असलेल्या मनुष्याला ठार केल्यानंतर एक गट तर असेच म्हणत राहिला की, ह.ईसा عليه السلام ला ठार करून टाकले; परंतु दुसरा गट ज्याला हा अंदाज येऊन चुकला होता की, सुळी जाणारा इसम ह.ईसा عليه السلام नाही; कोणी दुसराच आहे. तो गट ह.ईसा عليه السلام ला ठार करण्याला आणि सुळी देण्याला नाकारतच राहिला; काही म्हणतात की त्यांनी ह.ईसा عليه السلام ला आकाशावर जातांना पाहिलेपण होते. काही म्हणतात की, या मतभेदाने अभिप्रेत तो मतभेद आहे जो स्वत: खिस्त्यांमध्ये झाला. खिस्त्यांच्या 'नस्तुरिया' पंथाने सांगितले की, ह.ईसा عليه السلام ला शरीराच्या दृष्टीनेतर सुळावर चढवून देण्यात आले; परंतु अल्लाहच्या दृष्टीकोनातून नाही. 'मलकानिया' पंथाने म्हटले की, हा वध आणि सुळी चढविणे (नासूत आणि लाहूत) दोन्ही दृष्टीने पूर्णपणे झाला आहे. (फत्हुल कदीर) परंतु तो मतभेद शंका कुशंकेचा बळी आहे.

४) हे प्रमाण या गोष्टीवर स्पष्ट आहे की, अल्लाहतआलाने आपल्या संपूर्ण सामर्थ्याने ह.ईसा عليه السلام ला जिवंत आकाशावर उचलून घेतले आणि क्रमश: या हदीसी बुखारी व स. मुस्लीम बरोबर हदीसीच्या सर्व पुस्तकांत देखील आलेल्या आहेत. या हदीसीमध्ये, आकाशावर उचलून घेण्याशिवाय कयामतच्या जवळ त्यांच्या अवतरण्याचा आणि दुसऱ्या पुष्कळशा गोष्टींची चर्चा आहे. ईमाम इब्ने कसीर, या सर्व रिवायतींचे वर्णन करून शेवटी, लिहितात, ''या हदीसी रसूल ﷺ कडून क्रमश: आलेल्या आहेत. त्यांच्या रावीमध्ये, ह.अबु हुरैरा, ह.अब्दुल्लाह बिन मसऊद, उस्मान बिन अबुल आस, अबु उमामा, नव्वास बिन समआन, अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस, मजमा बिन जारिया, अबी सरिहा आणि हुजैफा बिन अुसैद, रजी अल्लाहो अन्हुम आहेत. या हदीसीमध्ये आपल्या अवतरण्याचे वैशिष्ट्य आणि जागेचे वर्णन आहे. आपण (ह.ईसा عليه السلام ) दमिश्क मध्ये मिनारा शर्कीया जवळ, त्यावेळी उतरतील, जेव्हा फज्रच्या नमाजीची अकामत चालू असेल. ते खिंजीरला ठार करतील. सलीब (क्रास) तोडून टाकतील. जिझीया माफ करून टाकतील. त्यांच्या काळांत सर्व मुसलमान होऊन जातील. दज्जालचा वध पण त्यांच्याच हाताने होईल आणि याजूज माजूज चे जाहीर होणे आणि त्यांचा फसादपण आपल्याच उपस्थितीत होईल. शेवटी आपल्याच शापाने ते गारत होतील.

५) तो सामर्थ्यवान आणि युक्तीवान आहे; त्याच्या इच्छेला कोणी टाळू शकत नाही. आणि जो याच्या आश्रयाला येऊन जाईल, त्याचे कोणी नुकसान करू शकत नाही. आणि तो बुद्धीमान आहे. तो जो काही निर्णय करतो, तो युक्तीवर आधारित असतो.

وَإِنْ مِّنْ أَهْلِ الْكِتٰبِ إِلَّا لَيُؤْمِنَنَّ بِهٖ قَبْلَ مَوْتِهٖ ۚ وَيَوْمَ الْقِيٰمَةِ يَكُوْنُ عَلَيْهِمْ شَهِيْدًا ﴿١٥٩﴾

ग्रंथधारी लोकांतून एकपण असा सुटणार नाही, जो ह.ईसा (अ.) च्या मृत्यूपूर्वी त्यांच्यावर ईमान आणणार नाही[१] आणि कयामतच्या दिवशी आपण (सल्ल.) त्यांच्यावर साक्ष राहाल[२] (१५९)

فَبِظُلْمٍ مِّنَ الَّذِيْنَ هَادُوْا حَرَّمْنَا عَلَيْهِمْ طَيِّبٰتٍ أُحِلَّتْ لَهُمْ وَبِصَدِّهِمْ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ كَثِيْرًا ﴿١٦٠﴾

ज्या चांगल्या चांगल्या गोष्टी त्यांच्यासाठी हलाल केल्या गेल्या होत्या त्या आम्ही त्यांच्यावर हराम करून टाकल्या त्यांच्या जुलूमामुळे आणि अल्लाहतआलाच्या मार्गापासून बहुतेक लोकांना रोकण्यामुळे[३] (१६०)

وَّأَخْذِهِمُ الرِّبٰوا وَقَدْ نُهُوْا عَنْهُ وَأَكْلِهِمْ أَمْوَالَ النَّاسِ بِالْبَاطِلِ ۗ وَأَعْتَدْنَا لِلْكٰفِرِيْنَ مِنْهُمْ عَذَابًا أَلِيْمًا ﴿١٦١﴾

आणि व्याज ज्याच्यापासून त्यांना मना करण्यात आले होते; त्याच्या घेतल्यामुळे आणि लोकांचा माल नाहक हडप केल्यामुळे आणि त्यांच्यात जे काफिर आहेत; आम्ही त्यांच्यासाठी वेदनादायक शिक्षा तयार करून ठेवली आहे (१६१)

لٰكِنِ الرّٰسِخُوْنَ فِي الْعِلْمِ مِنْهُمْ وَالْمُؤْمِنُوْنَ يُؤْمِنُوْنَ بِمَآ أُنْزِلَ إِلَيْكَ وَمَآ أُنْزِلَ مِنْ قَبْلِكَ وَالْمُقِيْمِيْنَ الصَّلٰوةَ وَالْمُؤْتُوْنَ الزَّكٰوةَ وَالْمُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ ۗ أُولٰٓئِكَ سَنُؤْتِيْهِمْ أَجْرًا عَظِيْمًا ﴿١٦٢﴾ ع ٢٢/١٠/٢

परंतु यांच्यातून जे संपूर्ण आणि भक्कम ज्ञानवाले आहेत[४] आणि ईमानवाले आहेत, जे यावर ईमान आणतात, जे आपल्याकडे उतारण्यांत आले आहे; आणि जे आपल्यापूर्वी उतारण्यात आले आहे; आणि नमाजीला कायम करणारे आहेत[५]; आणि जकातीचे अदा करणारे आहेत[६]; आणि अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान ठेवणारे आहेत[७], हे आहेत ज्यांना आम्ही फार मोठे मोबदले देऊ (१६२) ऊ २२/१०/२

إِنَّآ أَوْحَيْنَآ إِلَيْكَ كَمَآ أَوْحَيْنَآ إِلٰى نُوْحٍ وَّالنَّبِيّٖنَ مِنْ بَعْدِهٖ ۚ وَأَوْحَيْنَآ إِلٰٓى إِبْرٰهِيْمَ وَإِسْمٰعِيْلَ وَإِسْحٰقَ وَيَعْقُوْبَ وَالْأَسْبَاطِ وَعِيْسٰى وَأَيُّوْبَ وَيُوْنُسَ وَهٰرُوْنَ وَسُلَيْمٰنَ ۚ وَاٰتَيْنَا دَاوٗدَ زَبُوْرًا ﴿١٦٣﴾

खचितच् आम्ही आपल्याकडे अशाप्रकारे 'वह्य' केले आहे की, जसे नूह (अ.) आणि त्यांच्या नंतरच्या पैगंबराकडे आणि आम्ही 'वह्य' केले इब्राहीम (अ.) आणि इस्माईल (अ.) आणि इस्हाक (अ.) आणि याकूब (अ.) आणि त्यांच्या संततीवर आणि ह.ईसा (अ.) आणि अय्यूब (अ.) आणि यूनुस (अ.) आणि हारूण (अ.) आणि सुलेमान (अ.) कडे[८] आणि आम्ही दाऊद (अ.) ला 'ज़बूर' प्रदान केले (१६३)

وَرُسُلًا قَدْ قَصَصْنٰهُمْ عَلَيْكَ مِنْ قَبْلُ وَرُسُلًا لَّمْ نَقْصُصْهُمْ عَلَيْكَ ۗ وَكَلَّمَ اللّٰهُ مُوْسٰى تَكْلِيْمًا ﴿١٦٤﴾

आणि आपल्या पूर्वीच्या पुष्कळशा पैगंबरांच्या गोष्टी, आम्ही आपणांस वर्णन करून दिल्या आहेत[९]. आणि पुष्कळशा पैगंबराच्या गोष्टीचे वर्णन सुद्धा केले नाही[१०]. आणि मूसा (अ.) बरोबर स्पष्टपणे अल्लाहतआलाने संभाषण (पण) केले[११] (१६४)

१) काही भाष्यकाराजवळ हे ग्रंथधारी लोक खिस्ती आहेत. अर्थ असा की, प्रत्येक खिस्ती, मृत्यूच्या वेळी, ह.ईसावर ईमान आणतो. जरी मृत्यूच्या वेळचे ईमान फायदेकारक नाही. परंतु (सलफ) पूर्वीच्या लोकांजवळ आणि बहुतेक भाष्यकारांजवळ, याचा 'मरजा' ह.ईसा عليه السلام आहेत. आणि अर्थ हा आहे की, जेव्हा दुसऱ्यादा जगात येतील, आणि ते 'दज्जाल' ला ठार करून इस्लामचा जयजयकार करतील, तर त्यावेळी जेवढे यहूदी आणि खिस्ती असतील, त्यांना पण ठार करून टाकतील आणि जगाच्या पाठीवर, मुसलमानांशिवाय आणखी कोणी वाचणार नाही. अशाप्रकारे या जगांत जितके पण ग्रंथधारी लोक ह.ईसा عليه السلام वर ईमान आणणारे आहेत; ते ह.ईसा عليه السلام च्या मृत्यूपूर्वी त्यांच्यावर ईमान आणून, या जगांतून प्रस्थान करतील. जरी त्यांचे ईमान कुठल्याही ढंगाचे असो ! सहीह हदीसींनी सुद्धा हेच सिद्ध आहे. म्हणून नबी ﷺ नी फरमाविले, शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची ! ज्याच्या हातांत माझे प्राण आहेत; एक वेळ आवश्य येईल, की तुमच्यात मर्यमपुत्र अधिकारी आणि न्यायदंडाधिकारी म्हणून अवतीर्ण होतील. ते क्रूसाला (सलेब) तोडून टाकतील, खिंजीरांना (वराह) ठार करतील, 'जिझीया' उचलून घेतील, आणि संपत्तीचे एवढे अधिक्य होईल की, दानधर्म घेणारा कोणी असणार नाही. येथपावेतो की एक सजदा, जग आणि जगात जे काही आहे, त्यापेक्षा उत्तम असेल. मग ह.अबुहुरैरा رضي الله عنه म्हणतात, जर तुम्ही इच्छाल तर कुरआन करीमचे हे महावाक्य वाचून घ्या ''ग्रंथधारी लोकांतून एकपण असा वाचणार नाही की, जो (ह.ईसा عليه السلام च्या) मृत्यूपूर्वी त्यांच्यावर ईमान आणणार नाही.'' (स.बुखारी किताबुल अंबिया) या हदीसी इतक्या भरपूर प्रमाणांत आल्या आहेत की, त्यांना क्रमश: येण्याचा दर्जा

प्राप्त झाला आहे. आणि याच क्रमवार येणाऱ्या हदीसीच्या आधारावर अहले सुन्नतच्या सर्व धार्मिक पाठशाळांची एकजुटीची श्रद्धा आहे, की ह.ईसा ﷷ आकाशावर जिवंत आहेत. आणि कयामतच्या जवळपास त्यांचे जगात अवतरण होईल. आणि दज्जाल आणि सर्व धर्मांचा खातमा करून, इस्लामला लागू करतील. याजूज माजूजचे आगमन पण ह.ईसा ﷷ च्या उपस्थितीतच होईल; आणि ह.ईसा ﷷ च्या प्रार्थनेच्या बरकतीमुळे, या संकटाचापण शेवट होईल; जसे की हदीसींनी स्पष्ट आहे.

२) ही साक्ष आपल्या पूर्व जीवनापर्यंतच्या स्थिती संबंधी असेल. जसा की, सू.माईदः च्या शेवटी खुलासा आहे, ''मी जोपर्यंत त्यांच्यात उपस्थित राहिलो; त्यांच्या स्थितीशी माहितगार राहिलो.''

३) म्हणजे याच्या या अपराध गुन्ह्यांमुळे शिक्षा म्हणून पुष्कळशा हलाल वस्तू आम्ही त्यांच्यावर हराम करून टाकल्या होत्या (ज्यांचा खुलासा सू.अन्आम महावाक्य १४६ मध्ये आहे.)

४) याच्याने अभिप्रेत अब्दुल्लाह बिन सलाम वगैरे आहेत; जे यहूद्यांमधून मुसलमान होऊन गेले होते.

५) याच्याने अभिप्रेत सुद्धा ते ईमानवाले आहेत, जे ग्रंथधारी लोकांतून मुसलमान झालेत. किंवा मुहाजिरीन व अन्सार अभिप्रेत आहेत. म्हणजे धर्मशास्त्राचे पक्के ज्ञान बाळगणारे आणि ईमानाच्या परिसीमेने सुशोभित लोक त्या पापाच्या करण्यापासून वाचतात ज्यांना अल्लाहतआला नापसंद करतो.

६) याच्याने अभिप्रेत संपत्तीची जकात आहे. किंवा जिवाची जकात म्हणजे आपल्या चारित्र्य आणि कर्तृत्वाची पवित्रता आणि त्यांना चोखे करणे किंवा दोन्हीही अभिप्रेत आहेत.

७) म्हणजे या गोष्टीवर विश्वास ठेवतात की, अल्लाहशिवाय कोणी उपास्य नाही. तसेच मृत्यूनंतर पुन्हा उठण्यावर आणि कर्मावर बक्षीसी किंवा शिक्षा मिळेल. यावर विश्वास ठेवतात.

८) ह.इब्ने अब्बास ﷺ नी उल्लेखित आहे की, काही लोकांनी म्हटले की, ह.मूसा ﷷ नंतर कोण्या मनुष्यावर अल्लाहतआलाने काही अवतरीत केले नाही; आणि अशाप्रकारे नबी ﷺ च्या आणि पैगंबरीला पण नाकारले. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (इब्ने कसीर) ज्यात उल्लेखित म्हणण्याचे खंडन करून मोहम्मद ﷺ च्या पैगंबरीला सिद्ध केले गेले आहे. (अला साहिबेहा अस्सलात व तहैय्या)

९) ज्या पैगंबरांची नांवे आणि त्यांच्या गोष्टी, कुरआन करीम मध्ये वर्णन केल्या गेल्या आहेत; त्यांची संख्या २४ किंवा २५ आहेत.

१) आदम २) इद्रीस ३) नूह ४) हूद ५) सॉलेह ६) इब्राहीम ७) लूत ८) इस्माईल ९) इस्हाक १०)याकूब ११) यूसुफ १२) अय्युब १३) शोएब १४) मूसा १५) हारून १६) यूनुस १७) दाऊद १८) सुलैमान १९)इलियास २०) अलयसआ २१) जकरिया २२) यहया २३) ईसा २४) जुलकिफ्ल (बहुतेक भाष्यकारांजवळ) २५)ह.मोहम्मद सलवातुल्लाहे व सलामुहु अलैहे व अलयहिम अजमईन.

१०) ज्या नबी आणि रसूलांचे नांव आणि गोष्टी कुरआनात वर्णन केल्या गेल्या नाहीत. त्यांची संख्या किती आहे? अल्लाहच चांगले जाणतो. एक हदीसमध्ये, जी फार प्रसिद्ध आहे, एक लाख चोवीस हजार आणि एका हदीसमध्ये ८ हजार संख्या दाखविण्यात आली आहे. परंतु ही रिवायत फारच कमजोर आहे. कुरआन व हदीसने फक्त हेच ठाऊक होते की, वेगवेगळ्या काळांत आणि परिस्थितीत पैगंबर येत राहिले आहेत. सरतेशेवटी पैगंबरांचे येणे ह.मोहम्मद ﷺ वर संपवून टाकण्यात आले. आपण ﷺ पूर्वी किती पैगंबर आलेत, त्यांची खरी संख्या अल्लाहतआलाशिवाय कोणी जाणत नाही. तथापि आपण ﷺ नंतर जितके ही पैगंबरीचा दावा करणारे होऊन चुकले किंवा होणार आहे. सर्वच्या सर्व दज्जाल आणि खोटारडे आहेत. आणि त्यांच्या खोट्या पैगंबरीवर ईमान आणणारे इस्लामच्या वर्तुळातून बाहेर आहेत. आणि 'उम्मते मोहम्मदिया'पेक्षा एक वेगळी समांतर चालणारी उम्मत आहे. जशी उम्मते बाबिया, बहाइया आणि उम्मते मिर्जाइया वगैरे. अशाच प्रकारे मिर्झा कादयानीला परत येणारा 'मसीह' मानणारे लाहोरी मिर्झाई सुद्धा.

११) हे मूसा ﷷ चे ते खास वैशिष्ट्य आहे, ज्यांत ते दुसऱ्या पैगंबरापेक्षा निराळे आहेत. सहीह इब्ने हब्बानच्या एका रिवायतीच्या अनुषंगाने इमाम इब्ने कसीरने अल्लाहशी संभाषणाच्या वैशिष्ट्यांत ह.आदम ﷷ व ह.मोहम्मद ﷺ ला पण सामील मानले आहे. (तफसीर इब्ने कसीर)

رُسُلًا مُّبَشِّرِيْنَ وَمُنْذِرِيْنَ لِئَلَّا يَكُوْنَ لِلنَّاسِ عَلَى اللّٰهِ حُجَّةٌ ۢ بَعْدَ الرُّسُلِ ۚ وَكَانَ اللّٰهُ عَزِيْزًا حَكِيْمًا ﴿١٦٥﴾

**आम्ही त्यांना पैगंबर बनविले आहे; खुषखबरी देणारे आणि सावध करणारे[१]; यासाठी की लोकांची काही हुज्जत आणि आरोप पैगंबरांना पाठविल्यानंतर, अल्लाहतआलावर न रहावा[२]; अल्लाहतआला फारच सामर्थ्यवान आणि फारच बुद्धीमान आहे (१६५)**

لٰكِنِ اللّٰهُ يَشْهَدُ بِمَآ اَنْزَلَ اِلَيْكَ اَنْزَلَهٗ بِعِلْمِهٖ ۚ وَالْمَلٰٓئِكَةُ يَشْهَدُوْنَ ۚ وَكَفٰى بِاللّٰهِ شَهِيْدًا ﴿١٦٦﴾

**जे काही आपणाकडे उतारण्यात आले आहे, त्याच्याबाबतीत स्वत: अल्लाहतआला साक्ष देतो की, त्याला आपल्या ज्ञानाने उतारले आहे. आणि देवदूतपण साक्ष देतात आणि अल्लाहतआला साक्षीदार म्हणून पुरेसा आहे (१६६)**

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَصَدُّوْا عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ قَدْ ضَلُّوْا ضَلٰلًا ۢ بَعِيْدًا ﴿١٦٧﴾

**(ज्या) लोकांनी नाकारले, आणि अल्लाहतआलाच्या मार्गापासून दुसऱ्यांना अडविले; ते खचितच् मार्ग भ्रष्टतेत फारच दूर निघून गेले (१६७)**

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَظَلَمُوْا لَمْ يَكُنِ اللّٰهُ لِيَغْفِرَ لَهُمْ وَلَا لِيَهْدِيَهُمْ طَرِيْقًا ﴿١٦٨﴾

**ज्या लोकांनी 'कुफ्र' केले; आणि जुलूम केला; त्यांना अल्लाहतआला कधीच कधीच क्षमा करणार नाही. आणि त्यांना कुठलाही मार्ग दाखविणार नाही[३] (१६८)**

اِلَّا طَرِيْقَ جَهَنَّمَ خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ۚ وَكَانَ ذٰلِكَ عَلَى اللّٰهِ يَسِيْرًا ﴿١٦٩﴾

**नरकाग्नीच्या मार्गाशिवाय, ज्यात ते नित्य निरंतर पडून राहतील, आणि हे अल्लाहतआलासाठी फारच सोपे आहे (१६९)**

يٰٓاَيُّهَا النَّاسُ قَدْ جَآءَكُمُ الرَّسُوْلُ بِالْحَقِّ مِنْ رَّبِّكُمْ فَاٰمِنُوْا خَيْرًا لَّكُمْ ۚ وَاِنْ تَكْفُرُوْا فَاِنَّ لِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۚ وَكَانَ اللّٰهُ عَلِيْمًا حَكِيْمًا ﴿١٧٠﴾

**अहो लोकांनो! तुमच्याजवळ, तुमच्या पालनकर्त्याकडून सत्य घेऊन पैगंबर येऊन पोहचला आहे; मग तुम्ही ईमान आणा; कारण की, तुमचे भले व्हावे. आणि जर तुम्ही काफिर होऊन गेले तर अल्लाहचीच आहे ती प्रत्येक वस्तू जी आकाशात आणि पृथ्वीत आहे[४]; आणि अल्लाहतआला वाकबदार आणि सत्य संकल्प आहे (१७०)**

१) ईमानवाल्यांना स्वर्ग आणि तेथील देणग्यांची खुषखबर देणे आणि काफिरांनी अल्लाहची शिक्षा आणि भडकणाऱ्या नरकाग्नीपासून भिवविणे.

२) म्हणजे पैगंबरी आणि तंबीह करणे व खुषखबरी देणे हा क्रम आम्ही यासाठी कायम केला की, कोणाजवळ ही सबब बाकी राहू नये की आमच्याजवळ तुझा संदेश पोहचलाच नाही. जसे दुसरे ठिकाणी फरमाविले, ''जर आम्ही त्यांना पैगंबरा (च्या पाठविण्या) पूर्वीच गारत करून टाकले असते, तर ते म्हणते की हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हाकडे कोणी पैगंबर का बरे पाठवला नाही? की आम्ही अप्रतिष्ठीत आणि फजीत होण्यापूर्वीच (तुझ्या) महावाक्याचे अनुकरण करून घेतले असते.'' (सू. ताहा-१३४)

३) कारण की, लगातार 'कुफ्र' आणि जुलूम करून, त्यांनी आपल्या अंत:करणाला काळे कुट्ट करून घेतले आहे. म्हणून आता त्यांचेकडून मार्गदर्शनाची आणि क्षमायाचनेची काही आशा बाळगली जाऊ शकत नाही.

४) म्हणजे तुमच्या 'कुफ्र' मुळे अल्लाहचे काय वाईट होणार? जसे ह.मूसा عليه السلام नी आपल्या समाजाला सांगितले होते, ''जर तुम्ही आणि या जगाच्या पाठीवर वस्ती करून राहणारे सर्वच्या सर्व जर 'कुफ्र' चा मार्ग पत्करतील तर ते अल्लाहचे काय वाईट करणार? खचितच् अल्लाहतआला निरपेक्ष आणि स्तुतीस पात्र आहे.'' (सू. इब्राहीम-८) आणि हदीस कुद्सी आहे, अल्लाहतआला फर्मावितो, ''हे माझ्या सेवकांनो! जर तुमच्या पूर्वीचे आणि शेवटचे सर्व मनुष्ये आणि 'जिन्न', या एका माणसाच्या मनासारखे होऊन जातील, जो तुमच्यामध्ये सर्वांत जास्त सदाचरणी आहे, तर यामुळे माझ्या बादशाहीमध्ये वाढ होणार नाही; आणि जर तुमचे पुढील आणि शेवटचे आणि मनुष्ये आणि 'जिन्न' या एका माणसाच्या मनासारखे होऊन जातील, जो तुमच्यात सर्वांत जास्त आज्ञाभंजक असेल, तर त्याच्यामुळे माझ्या बादशाही मध्ये काही कमी होणार नाही. हे माझ्या सेवकांनो ! जर तुम्ही सर्व एका मैदानात जमा होऊन जाल, आणि माझ्याजवळ मागाल आणि मी प्रत्येक मनुष्याला, त्याच्या मागणी प्रमाणे देऊन टाकेन तर याच्याने माझ्या खजिन्यात इतकेच कमी होईल जितके सुईला समुद्रात बुडवून काढल्याने समुद्राचे पाणी कमी होईल. (स.मुस्लीम)

يٰۤاَهۡلَ الۡكِتٰبِ لَا تَغۡلُوۡا فِىۡ دِيۡنِكُمۡ وَلَا تَقُوۡلُوۡا عَلَى اللّٰهِ اِلَّا الۡحَـقَّ‌ ؕ اِنَّمَا الۡمَسِيۡحُ عِيۡسَى ابۡنُ مَرۡيَمَ رَسُوۡلُ اللّٰهِ وَكَلِمَتُهٗ ۚ اَ لۡقٰهَاۤ اِلٰى مَرۡيَمَ وَرُوۡحٌ مِّنۡهُ‌ فَاٰمِنُوۡا بِاللّٰهِ وَرُسُلِهٖ‌ ۚ وَلَا تَقُوۡلُوۡا ثَلٰثَةٌ‌ ؕ اِنْتَهُوۡا خَيۡرًا لَّـكُمۡ‌ ؕ اِنَّمَا اللّٰهُ اِلٰـهٌ وَّاحِدٌ‌ ؕ سُبۡحٰنَهٗۤ اَنۡ يَّكُوۡنَ لَهٗ وَلَدٌ‌ ۘ لَهٗ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ‌ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ وَكِيۡلًا ﴿۱۷۱﴾

**अहो ग्रंथधारी लोकांनो! आपल्या धर्माच्या बाबतीत मर्यादेचे उल्लंघन करू नका[३]; आणि अल्लाहवर सत्याशिवाय काहीही सांगू नका. मसीह ईसा बिन मर्यम (अ.) तर फक्त अल्लाहतआलाचे पैगंबर आणि त्याची आज्ञा आहे. जिला मर्यम (अ.) कडे टाकून देण्यात आले होते. आणि त्याच्याजवळचा आत्मा[४] आहे. म्हणून तुम्ही अल्लाहला आणि त्याच्या सर्व पैगंबरांना माना. आणि असे म्हणू नका की, अल्लाह तीन आहेत[५]; यापासून परावृत्त व्हा. की यांतच तुमचे भले आहे; उपासनेच्या लायक तर अल्लाह एकच आहे; आणि तो यापासून पवित्र आहे की त्याला संतती असावी. जे काही आकाशांत आहे आणि जे काही पृथ्वीत आहे, ते सर्व काही तर त्याचेच आहे; आणि अल्लाह कार्यसाधक पुरेसा आहे (१७१)**

१) 'गुलू' चा अर्थ आहे, कोण्या गोष्टीला तिच्या मर्यादे पलीकडे वाढवून देणे. जसे ख्रिस्त्यांनी ह.ईसा عليه السلام आणि त्यांच्या आईच्या बाबतीत केले; की त्यांना पैगंबरी आणि सेवक होण्याच्या स्थानावरून उचलून उपास्याच्या दर्जापर्यंत पोहचवून दिले. आणि त्यांची अल्लाहप्रमाणे उपासना करू लागले. याचप्रमाणे ह.ईसा عليه السلام च्या अनुयायांना देखील मर्यादेपेक्षा जास्त वाढवून 'निष्पाप' करून टाकले; आणि त्यांना हलाल आणि हराम ठरविण्याचा अधिकार बहाल करून टाकला. जसे की, अल्लाहतआला ने फर्माविले, ''त्यांनी आपल्या धर्मपंडितांना आणि संन्याशांना, अल्लाहला सोडून आपला पालनकर्ता बनवून घेतले.'' (सू.तौबा-३१) हे पालनकर्ता बनविणे, हदीसीप्रमाणे त्यांच्या हलाल केलेल्याला हलाल आणि हराम केलेल्याला हराम समजणे होते. वास्तविक हा अधिकार फक्त अल्लाहला प्राप्त आहे. परंतु ग्रंथधारी लोकांनी हा अधिकार सुद्धा आपल्या धर्मपंडित वगैरेंना देऊन टाकला. अल्लाहतआलाने या महावाक्यात ग्रंथधारी लोकांना, धर्मांत याच मर्यादेपलीकडे जाण्यापासून मना केले आहे. नबी ﷺ नी सुद्धा ख्रिस्त्यांच्या मर्यादेपलीकडे जाण्याला दृष्टीसमोर ठेवून आपल्या उम्मतला सावध केले, ''तुम्ही मला अशाप्रकारे मर्यादेच्या पलिकडे नेऊ नका, ज्याप्रमाणे ख्रिस्त्यांनी ईसा बिन मर्यम عليه السلام ला पुढे केले होते. मी तर फक्त अल्लाहचा सेवक आहे. बस, मला तुम्ही त्याचा सेवक आणि पैगंबरच म्हणावे '' (स.बुखारी , मुसनद अहमद) परंतु खेद आहे की, 'उम्मते मोहम्मदिया, या ''गुलू'' पासून सुरक्षित राहू शकली नाही. ज्यात ख्रिस्ती व्यस्त झालेत. आणि उम्मते मोहम्मदियाने पण आपल्या पैगंबराला किंबहुना पुण्यवान सेवकांना सुद्धा अल्लाहच्या वैशिष्ट्यांनी युक्त ठरवून दिले; जी वास्तविक ख्रिस्त्यांची पध्दत होती. अशाचप्रकारे धर्मपंडित आणि धर्मशास्त्रींना सुद्धा स्पष्ट करून सांगणारे आणि खुलासा करणारे, मानण्याऐवजी, त्यांना धर्मशास्त्र बनविण्याचा अधिकार असलेले बनवून दिले आहे. फ इन्नलिल्लाह व इन्ना इलैहे राजेऊन! खरे फरमाविले नबी ﷺ नी, ''ज्याप्रमाणे एक जोडा दुसऱ्या जोड्याच्याबरोबर असतो; बिलकुल अशाचप्रकारे तुम्ही मागच्या उम्मतीचे अनुकरण कराल.'' म्हणजे त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चालणार.

२) 'कलिमतुल्लाह' चा अर्थ हा आहे की, शब्द 'कुन्' ने बापाशिवाय त्यांची निर्मिती झाली आणि हा शब्द ह.जिब्रईल عليه السلام च्या मार्फत, ह.मर्यम عليها السلام पर्यंत पोहोचवला गेला. रूहुल्लाह चा अर्थ ती फुंक आहे, जी जिब्रईल عليه السلام नी अल्लाहच्या हुकूमाने ह.मर्यम عليها السلام च्या पोषाखाचा तो हिस्सा जो गळ्याखाली होता. त्यावर फुंक मारली, जिला अल्लाहतआलाने बापाच्या विर्याच्या थेंबासारखा कायम करून दिला. अशा प्रकारे ईसा عليه السلام अल्लाहचा कलमापण आहे, ज्याला देवदूताने ह.मर्यमकडे टाकला आणि त्याचा तो आत्मा आहे, ज्याला घेऊन जिब्रईल मर्यमकडे पाठविले गेले. (तफसीर इब्ने कसीर)

३) ख्रिस्त्यांचे अनेक पंथ आहेत. काही ह.ईसा عليه السلام ला अल्लाह, काही अल्लाहचा सरकतदार आणि काही अल्लाहचा मुलगा मानतात. मग जे अल्लाह मानतात ते तीन ईश्वराचे आणि ह.ईसा عليه السلام ला त्या तीन मधून एक (ईश्वर) मानणारे आहेत. अल्लाहतआला म्हणतो, तीन ईश्वर म्हणण्यापासून परावृत्त होऊन जा. अल्लाहतआला तर एकच आहे.

لَنْ يَسْتَنْكِفَ الْمَسِيحُ أَنْ يَكُونَ عَبْدًا لِلَّهِ وَلَا الْمَلَائِكَةُ الْمُقَرَّبُونَ ۚ وَمَنْ يَسْتَنْكِفْ عَنْ عِبَادَتِهِ وَيَسْتَكْبِرْ فَسَيَحْشُرُهُمْ إِلَيْهِ جَمِيعًا ﴿١٧٢﴾

मसीह (अ.) ला अल्लाहचा सेवक होण्यात, काही कमीपणा किंवा आकडूपणा आणि नकार कधीच होऊ शकत नाही. तसेच न सानिध्य प्राप्त देवदूतांना[१]; त्याच्या उपासनेपासून जो कोणी तोंड फिरवील आणि गर्वांत येऊन जाईल आणि नाकारेल, अल्लाहतआला त्या सर्वांना एकत्र आपल्याजवळ गोळा करील (१७२)

فَأَمَّا الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ فَيُوَفِّيهِمْ أُجُورَهُمْ وَيَزِيدُهُمْ مِنْ فَضْلِهِ ۖ وَأَمَّا الَّذِينَ اسْتَنْكَفُوا وَاسْتَكْبَرُوا فَيُعَذِّبُهُمْ عَذَابًا أَلِيمًا وَلَا يَجِدُونَ لَهُمْ مِنْ دُونِ اللَّهِ وَلِيًّا وَلَا نَصِيرًا ﴿١٧٣﴾

मग ज्या लोकांनी ईमान आणले आहे, आणि चांगली कामे केली आहेत; त्यांना त्याचा पुरा पुरा मोबदला देईल. आणि आपल्या कृपेने आणखी जास्त देईल[२]. आणि जे लोक नाक मोडीत होते आणि शेखी मिरवत होते[३], आणि नाकारत होते त्यांना दु:खदायी शिक्षा देईल[४]. आणि ते आपल्यासाठी अल्लाहशिवाय आणखी कोणी दोस्त हिमायती आणि मदद करणारा पावणार नाही (१७३)

يَا أَيُّهَا النَّاسُ قَدْ جَاءَكُمْ بُرْهَانٌ مِنْ رَبِّكُمْ وَأَنْزَلْنَا إِلَيْكُمْ نُورًا مُبِينًا ﴿١٧٤﴾

अहो लोकांनो! तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून प्रमाण येऊन चुकले[५] आणि आम्ही तुम्हाकडे, स्पष्ट आणि स्वच्छ प्रकाश उतारला आहे[६] (१७४)

فَأَمَّا الَّذِينَ آمَنُوا بِاللَّهِ وَاعْتَصَمُوا بِهِ فَسَيُدْخِلُهُمْ فِي رَحْمَةٍ مِنْهُ وَفَضْلٍ وَيَهْدِيهِمْ إِلَيْهِ صِرَاطًا مُسْتَقِيمًا ﴿١٧٥﴾

मग ज्या लोकांनी अल्लाहतआलावर ईमान आणले आणि त्याला भक्कम धरून ठेविले; त्यांना तर तो लवकरच आपल्या दयेत आणि कृपेत घेऊन घेणार आणि त्यांना आपल्याकडील योग्यमार्ग दाखवून देणार (१७५)

يَسْتَفْتُونَكَ قُلِ اللَّهُ يُفْتِيكُمْ فِي الْكَلَالَةِ ۚ إِنِ امْرُؤٌ هَلَكَ لَيْسَ لَهُ وَلَدٌ وَلَهُ أُخْتٌ فَلَهَا نِصْفُ مَا تَرَكَ ۚ وَهُوَ يَرِثُهَا إِنْ لَمْ يَكُنْ لَهَا وَلَدٌ ۚ فَإِنْ كَانَتَا اثْنَتَيْنِ فَلَهُمَا الثُّلُثَانِ مِمَّا تَرَكَ ۚ وَإِنْ كَانُوا إِخْوَةً رِجَالًا وَنِسَاءً فَلِلذَّكَرِ مِثْلُ حَظِّ الْأُنْثَيَيْنِ ۗ يُبَيِّنُ اللَّهُ لَكُمْ أَنْ تَضِلُّوا ۗ وَاللَّهُ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيمٌ ﴿١٧٦﴾

आपणास धर्मशास्त्रीय हुकूम विचारतात, आपण सांगून टाका की, अल्लाहतआला स्वत: तुम्हाला 'कलाला' च्या बाबतीत हुकूम देत आहे, (की) जर कोणी मनुष्य मृत्यू पावेल ज्याला संतती नसेल, आणि एक बहीण असेल, तर त्याच्या (मागे) सोडलेल्या संपत्तीचा अर्धा हिस्सा आहे[७]. आणि तो भाऊ या बहिणीचा वारस होईल, जर तिला संतती नसेल[७] आणि जर दोन बहिणी असतील, तर त्यांना एकूण (मागे) सोडलेल्याचा दोन तृतियांश मिळेल[८]. आणि जर कित्येक माणसे या नात्याची आहेत, पुरूष पण आणि स्त्रियांपण तर पुरूषांना दोन स्त्रियांबरोबर[९] वाटा आहे. अल्लाहतआला तुमच्यासाठी वर्णन करीत आहे की, असे न व्हावे की, तुम्ही बहकून जावे; आणि अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीचा जाणणारा आहे (१७६)

१) ह.ईसा عليه السلام प्रमाणे काही लोकांनी देवदूतांना देखील उपास्यत्वात सहभागी करून ठेवले होते. अल्लाहतआला म्हणत आहे की, हे तर सर्वच्या सर्व अल्लाहचे सेवक आहेत. आणि ही गोष्ट ते कधीच नाकारणार नाहीत. तुम्ही त्यांना अल्लाह किंवा त्याच्या उपास्यत्वात सहभागी कोणत्या आधारावर करतात?

२) काहींनी या 'जास्ती' ने अभिप्रेत हे घेतले आहे की, अल्लाहतआला ईमानवाल्यांना शिफारस करण्याचा हक्क बहाल करील. हा शिफारसी हक्क मिळवून ज्यांच्या बाबतीत अल्लाह इच्छिल हे शिफारस करतील.

३) म्हणजे अल्लाहच्या उपासना आणि आज्ञापालनापासून थांबून राहिले आणि याला नाकारत आणि गर्व करीत राहिले.

४) जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''नि:संशय जे लोक माझ्या उपासनेला नाकारतात आणि गर्वात येऊन जातात,

निश्चितच्च फजीत आणि अप्रतिष्ठीत होऊन नरकाग्नीत दाखल होतील'' (सू.मोमीन-६०)
५) बुरहान, अशी खंडन करणारी निशाणी जिच्यानंतर कोणाला सबबीची शक्यता राहत नाही. अशी निशाणी जिच्याने त्यांच्या शंका कुशंका गळून पडतील. याचसाठी पुढे याला 'तेजस्वी प्रकाशा' ने संबोधित केले आहे.
६) याच्याने अभिप्रेत कुरआन करीम आहे. जे कुफ्र आणि शिर्कच्या अंधकारात मार्गदर्शनाचा प्रकाश आहे. मार्ग भ्रष्टतेच्या पायवाटावर सरळमार्ग आणि अल्लाहची मजबूत दोरी आहे. बस याच्याप्रमाणे ईमान आणणारे, अल्लाहच्या दयेला आणि कृपेला पात्र होतील.
७) 'कलाला' च्या बाबतीत पहिले येऊन चुकले आहे की, त्या मृत्यू पावणाऱ्याला म्हटले जाते, ज्याचा बाप असेल ना बेटा. येथे पुन्हा याच्या 'मिरास'चे वर्णन करण्यात येत आहे. काही लोकांनी 'कलाला' त्या माणसाला ठरविले आहे, ज्याला फक्त मुलगा नसावा. म्हणजे बाप उपस्थित असावा; परंतु हे बरोबर नाही. 'कलाला' ची पहिली व्याख्याच बरोबर आहे. कारण की बापाच्या उपस्थितीत बहीण सुरवातीपासूनच 'वारस' होत नाही. बाप तिच्या बाजूचा संरक्षक बनून जातो. परंतु येथे अल्लाहतआला फरमावितो की, जर त्याची एक बहीण असेल, तर ती त्याच्या अर्ध्या संपत्तीची वारस होईल. ज्यामुळे स्पष्ट माहित होते की, 'कलाला' तो आहे, की ज्याला पुत्राबरोबर बापपण नसावा. असे मुलाचे नसणे तर, कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याने सिद्ध आहे. आणि बापाचे नसणे स्पष्ट महावाक्याच्या इशाऱ्याने सिद्ध होऊन जाते.
**मलहुजा** : पुत्राने अभिप्रेत पुत्र आणि नातू दोन्ही आहेत. त्याचप्रमाणे बहिणीने अभिप्रेत सख्खी बहीण किंवा सावत्र बहीण (बापाकडून) आहे. (अयसरूत्तफासीर) हदीसींनी सिद्ध आहे की, कलालाच्या बहिणीसोबत मुलीच्या उपस्थितीत, मुलीला अर्धा आणि बहिणीला अर्धा आणि मुलगी व नातच्या उपस्थितीत, मुलीला अर्धा, नातीला एक षष्ठमांश आणि बहिणीला बाकी म्हणजे एक तृतीयांश दिला गेला. (फत्हुल कदीर व इब्ने कसीर) याच्याने ठाऊक झाले की, मृत्यू पावणाऱ्याची संतती उपस्थित असेल, तर बहिणीला वारसदार प्रमाणे काही मिळणार नाही. आणि ती संतती जर पुत्र असेल, तर कुठल्याही प्रकारे काहीच मिळणार नाही. आणि जर मुलगी असेल तर बहीण तिच्या बरोबर विरशाचा बाकी हिस्सा घेणारी होऊन जाईल. आणि बाकी घेऊन घेईल. ही बाकी एका मुलीच्या उपस्थितीत अर्धी आणि एकापेक्षा जास्तच्या उपस्थितीत एक तृतियाश असेल.
८) अशाच प्रकारे जर बाप पण नसला, यासाठी की बाप भावापेक्षा जास्त जवळ आहे, बापाच्या उपस्थितीत भाऊ वारसच होत नाही. जर या 'कलाला'स्त्रीचा पती किंवा कोणी आईकडून भाऊ असेल, तर त्यांचा वाटा काढल्यानंतर बाकी संपत्तीचा वारस भाऊ ठरेल (इब्ने कसीर)
९) हाच हुकूम, दोनपेक्षा जास्त बहिणींच्या बाबतीत पण होईल. जणू अर्थ हा झाला की, 'कलाला' माणसाच्या दोन किंवा दोनपेक्षा जास्त बहिणी असतील, तर त्यांना सर्व संपत्तीच्या दोन तृतीयांश वाटा मिळेल.
१०) म्हणजे 'कलाला' जे वारस सरमिसळ (पुरूष आणि स्त्रिया दोन्ही) असतील, तर मग, ''एक पुरूष दोन स्त्रियांबरोबर'' च्या तत्त्वावर विरशाची वाटणी होईल.

آياتها ١٢٠ (٥) سُوْرَةُ الْمَآئِدَةِ مَدَنِيَّةٌ (١١٢) رُكُوْعَاتُهَا ١٦

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

महावाक्ये १२० | (५) सू. माइद: | रुकूअ १६

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَوْفُوْا بِالْعُقُوْدِ ۭ اُحِلَّتْ لَكُمْ
بَهِيْمَةُ الْاَنْعَامِ اِلَّا مَا يُتْلٰى عَلَيْكُمْ غَيْرَ مُحِلِّي
الصَّيْدِ وَاَنْتُمْ حُرُمٌ ۭ اِنَّ اللّٰهَ يَحْكُمُ مَا يُرِيْدُ ①

हे ईमानवाल्यांनो! करार आणि वचने पुरी करा[१]. तुमच्यासाठी चतुष्पाद जनावरे हलाल केली गेली आहेत[२]; त्यांच्याशिवाय ज्यांची नावे वाचून तुम्हास ऐकवून दिली जातील[३]. परंतु 'एहराम' च्या स्थितीत शिकारीला हलाल समजणारे बनू नका; नि:संशय अल्लाह जो इच्छितो तो हुकूम करीतो ①

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تُحِلُّوْا شَعَاۗىِٕرَ اللّٰهِ وَلَا
الشَّهْرَ الْحَرَامَ وَلَا الْهَدْيَ وَلَا الْقَلَاۗىِٕدَ وَلَآ
اٰۗمِّيْنَ الْبَيْتَ الْحَرَامَ يَبْتَغُوْنَ فَضْلًا مِّنْ رَّبِّهِمْ
وَرِضْوَانًا ۭ وَاِذَا حَلَلْتُمْ فَاصْطَادُوْا ۭ وَلَا يَجْرِمَنَّكُمْ
شَنَاٰنُ قَوْمٍ اَنْ صَدُّوْكُمْ عَنِ الْمَسْجِدِ الْحَرَامِ اَنْ
تَعْتَدُوْا ۘ وَتَعَاوَنُوْا عَلَي الْبِرِّ وَالتَّقْوٰى ۠ وَلَا تَعَاوَنُوْا
عَلَي الْاِثْمِ وَالْعُدْوَانِ ۠ وَاتَّقُوا اللّٰهَ ۭ اِنَّ اللّٰهَ شَدِيْدُ
الْعِقَابِ ②

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहतआलाच्या निशाण्यांचा अनादर करू नका[४]; तसेच सन्मानवाल्या महिन्यांचा[५] तसेच हरमच्या बळीचा आणि ज्या जनावरांच्या गळ्यात माळा घातल्या असतील, जे काबाकडे जात असतील[६] त्यांचा (अनादर करू नका) आणि तसेच त्या लोकांचा जे बैतुल्लाहच्या इरादाने आपल्या पालनकर्त्याची कृपा आणि त्याच्या प्रसन्नतेच्या नियतीने जात असतील त्यांचा[७]. हां! जेव्हा तुम्ही 'एहराम' उतारून टाकाल, तर शिकार करू शकतात[८], ज्या लोकांनी तुम्हाला मस्जिदे हरामपासून अडविले होते, त्यांचे शत्रुत्व तुम्हाला या गोष्टीवर प्रवृत्त करू नये की, तुम्ही मर्यादा सोडून वागावे[९]; पुण्य आणि सदाचरणात एक दुसऱ्यांची मदत करीत रहा आणि पाप व अत्याचार यात मदत करू नका[१०] आणि अल्लाहतआलाला भित रहा, नि:संशय अल्लाहतआला कडक शिक्षा देणारा आहे ②

حُرِّمَتْ عَلَيْكُمُ الْمَيْتَةُ وَالدَّمُ وَلَحْمُ الْخِنْزِيْرِ
وَمَآ اُهِلَّ لِغَيْرِ اللّٰهِ بِهٖ وَالْمُنْخَنِقَةُ وَالْمَوْقُوْذَةُ
وَالْمُتَرَدِّيَةُ وَالنَّطِيْحَةُ وَمَآ اَكَلَ السَّبُعُ اِلَّا
مَا ذَكَّيْتُمْ ۣ وَمَا ذُبِحَ عَلَي النُّصُبِ وَاَنْ تَسْتَقْسِمُوْا
بِالْاَزْلَامِ ۭ ذٰلِكُمْ فِسْقٌ ۭ اَلْيَوْمَ يَىِٕسَ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ
دِيْنِكُمْ فَلَا تَخْشَوْهُمْ وَاخْشَوْنِ ۭ اَلْيَوْمَ اَكْمَلْتُ لَكُمْ
دِيْنَكُمْ وَاَتْمَمْتُ عَلَيْكُمْ نِعْمَتِيْ وَرَضِيْتُ لَكُمُ
الْاِسْلَامَ دِيْنًا ۭ فَمَنِ اضْطُرَّ فِيْ مَخْمَصَةٍ غَيْرَ مُتَجَانِفٍ
لِّاِثْمٍ ۙ فَاِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ③

तुम्हास हराम केले गेले आहे, मुर्दाड आणि रक्त आणि डुकरांचे मास आणि जे अल्लाहतआलाच्या शिवाय अन्य कोणास नाम निर्दीष्ट केले गेले असेल[११]; आणि जे गळा घोटून मेले असेल[१२]; आणि जे कोण्या आघाताने मरण पावले असेल[१३], आणि जे उंच ठिकाणावरून पडून मेले असेल[१४]; आणि जे कोणी शिंग मारल्याने मेले असेल[१५] आणि ज्याला जंगली श्वापदांनी फाडून खाल्ले असेल[१६]; परंतु जर तुम्ही त्यास जबाह करून घ्याल, तर हराम नाही[१७]. आणि जे कुठल्या स्थानावर जबाह केले गेले असेल[१८], आणि हे पण की, बाणांच्याद्वारे वाटणी करून घेतली असेल[१९]; ही सर्व फारच वाईट पापे आहेत. आज काफिर तुमच्या धर्माकडून निराश होऊन गेलेत. खबरदार! तुम्ही त्यांना भिऊ नका, आणि मला भीत रहा. आज मी तुमच्यासाठी धर्माला पूर्ण करून दिले.आणि तुमच्यावर आमचे बक्षीस पूर्ण करून दिले. आणि तुमच्यासाठी इस्लामधर्म होण्यावर मी संमत होऊन गेलो; मग जो मनुष्य अती भुकेने व्याकूळ होऊन जाईल, या अटीवर कोण्या गुनाह करण्याकडे त्याची प्रवृत्ती नसावी. तर खचितच् अल्लाहतआला मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे[२०] ③

१) अुकुद अक्दचे अनेक वचन आहे. ज्याचा अर्थ गांठी मारण्याचा आहे. याचा उपयोग कित्येक वस्तूत गांठी मारण्यासाठी सुद्धा होतो. आणि पक्के वचन आणि करार करण्यावर सुद्धा. येथे याच्याने अभिप्रेत ते अल्लाहचे आदेश आहेत, ज्यांना अल्लाहने माणसांसाठी 'पार पाडणारे' ठरविले आहे. आणि ते वचन करार आणि व्यवहार सुद्धा आहेत, जे माणसे आपसांत करतात. ढोघांचे पूर्ण करणे आवश्यक आहे.

२) 'बहिमा' चतुष्पाद (चार पायांची जनावरे) ना म्हणण्यात येते. 'अनआम' उंट, गाय, बकरी आणि मेंढीला म्हणण्यात येते. कारण की याच्या चालीत धिमेपणा असतो. हे 'बहिमतुल अन्आम' नर आणि माढी मिळून आठ प्रकारचे आहेत. ज्यांचा खुलासा सू.अन्आम आ.क्र.१२४ मध्ये येईल. याशिवाय जी जनावरे जंगली म्हणविली जातात, उद्धाहरणार्थ हरीण, नीलगाय वगैरे ज्यांची सर्वसाधारण शिकार केली जाते. हे पण हलाल आहेत. अलबत्ता एहराम परिधाम केलेल्या अवस्थेत यांच्या शिकारीला मनाई आहे. सुन्नतमध्ये वर्णन केलेल्या तत्त्वाप्रमाणे जी जनावरे आपल्या सुळ्यांनी शिकार धरत नाहीत आणि जे पक्षी आपल्या पंजाने शिकार धरत नाहीत, ते सर्व हलाल आहेत. जसे की, सू.बकर: आ. क्र.१७३ च्या समासात खुलासा येऊन चुकला आहे. 'जूनाब' चा अर्थ आहे जी जनावरे आपल्या सुळ्यांनी आपली शिकार पकडतात आणि फाडतात, उद्धाहरणार्थ वाघ,चित्ता,कुत्रा लांडगा वगैरे. आणि 'जूमिखलब' चा अर्थ आहे, तो पक्षी जो आपल्या पंजाने आपली शिकार उचलत असेल, पकडत असेल. उद्धाहरणार्थ ससाणा,बाज,शाहिन,अुकाब (गरूड) वगैरे.

३) यांचे स्पष्टीकरण आ.क्र.३ मध्ये येत आहे.

४) शआइर 'शईरतुन' चे अनेक वचन आहे. याच्याने अभिप्रेत अल्लाहच्या प्रतिष्ठेच्या निशाण्या आहेत, (ज्यांचा आदर आणि प्रतिष्ठा अल्लाहने निश्चित केले आहे.) काहींनी याला सर्वसाधारण म्हणून गणले आहे; आणि काही जवळ याने हज्ज व उमराचे विधी अभिप्रेत आहे. म्हणजे त्यांचा अनादर आणि अप्रतिष्ठा करू नका. त्याचप्रमाणे हज्ज आणि उमऱ्यांच्या अदा करण्यात, कोणाच्या दरम्यान अडथळा पण बनू नका. की हे पण अनादर करणेच आहे.

५) 'अश्शहरूल हराम' याच्याने अभिप्रेत आहेत आदर सन्मानाचे चार महिने रज्जब,जुलकादा,जुलहज्जा आणि मोहर्रम यांचा आदर कायम ठेवा. त्यात युद्ध करू नका. काहींनी याच्याने फक्त एक महिना म्हणजे जुलहज्जा (हजचा महिना) अभिप्रेत धरला आहे. काहींनी या हुकूमाला, ''आणि मुशरिकीनला ठार करा, जेथे कोठे पावाल'' ने रद्द मानले आहे. परंतु याची जरूरी नाही. दोन्ही आदेशाच्या आपल्या आपल्या सिमा आहेत; ज्यांच्यात टकराव नाही.

६) 'हदी' अशा जनावराला म्हणतात, ज्याला हाजी, हरममध्ये बळी देण्यासाठी, आपल्या बरोबर घेऊन जात असत. 'कलाईद' 'कलादा' चे बहुवचन आहे. जे गळ्यातील पट्ट्याला म्हणतात. येथे हज्ज किंवा उमऱ्याच्यावेळी, बळी दिल्या जाणाऱ्या जनावरांना अभिप्रेत केले गेले आहे. ज्यांच्या गळ्यात चिन्ह आणि निशाणी म्हणून, जोडे किंवा पट्टे टाकून देण्यांत येत असत. म्हणून 'कलाईद' ने उद्देशीत तीच जनावरे झालीत. ज्यांना हरमकडे घेऊन जाण्यात येत असे. ही 'हदी' ची आणखी ताकीद आहे. अर्थ असा की या जनावरांना न कोणापासून हिसकावून घ्यावे; किंवा त्यांना हरमपर्यंत पोहचण्यात कुठलाही अडथळा उभा करु नये.

७) म्हणजे हज्ज उमराच्या नियतने किंवा व्यापार व व्यवहाराच्या गरजेपोटी 'हरम' ला जाणाऱ्यांना अडवू नका. तसेच त्यांना त्रास देऊ नका. काही भाष्यकारांजवळ हे आदेश, त्या वेळेचे आहेत. जेव्हा मुसलमान आणि मुशरिक एकत्र हज्ज व उमरा करीत असत. परंतु जेव्हा महावाक्य, ''मुशरेकीन तर घाणेरडे (अपवित्र) आहेत. या वर्षानंतर ते खाना ए काबाच्या जवळ जाऊ शकू नये.'' (सू. तौबा-२८) अवतीर्ण होऊन गेले, तेव्हा मुशरेकीनच्या मर्यादेपर्यंत हा हुकूम रद्द होऊन गेला; काहींच्या जवळ हे महावाक्य आदेशीत म्हणजे रद्द झालेले नाही; आणि हा हुकूम मुसलमानांच्या बाबतीत आहे. (फत्हुल कदीर)

८) येथे 'अमरे एबाहत' म्हणजे (जवाज़) सबब दाखविण्याकरीता आहे; म्हणजे जेव्हा तुम्ही 'एहराम' सोडून टाकाल, तर शिकार करणे तुम्हाला योग्य आहे.

९) म्हणजे जरी तुम्हाला या मुशरिकांनी हिजरी सन ६ मध्ये मस्जिदे हराममध्ये जाण्यापासून अडविले होते, परंतु तुम्ही त्यांच्याबरोबर , या अडविण्यामुळे, अत्याचाराची वागणूक अंगिकारू नका. शत्रुबरोबर सुद्धा नरमाई स्वीकारण्याचा आणि क्षमा करण्याचा धडा दिला जात आहे.

१०) हे एक फार महत्त्वाचे तत्त्व वर्णन करून देण्यात आले आहे. जे एका मुसलमानासाठी पावला पावलावर मार्गदर्शन देऊ शकते. अरेरे! मुसलमान या तत्त्वाला अंगिकारते तर, किती चांगले झाले असते!

११) येथून त्या हराम केलेल्या वस्तूंचा उल्लेख सुरू होत आहे. ज्यांचा आधार अध्यायाच्या सुरवातीला दिला गेला होता. महावाक्याचा इतका भाग सू.बकर: मध्ये येऊन चुकला आहे. (कृपया पहावे आ.क्र.१७३)

१२) गळा कोणी मनुष्य घोटून देईल; किंवा कोण्या वस्तूत अडकून स्वत: गळा घोटला जाईल दोन्ही प्रकारात मेलेले

जनावर हराम आहे.
१३) कोणी दगड, काठी किंवा आणखी एखादी वस्तू मारली; ज्याच्याने जबाह केल्याशिवाय मरून गेले. अज्ञान काळांत अशा जनावरांना खाऊन टाकण्यात येत असे. धर्मशास्त्राने त्याला मना करून टाकले. बंदुकीने शिकार केलेल्या प्राण्यांच्या बाबतीत धर्मपंडितात मतभेद आहेत. इमाम शौकानीने एका हदीशीचा आधार घेत बंदुकीच्या शिकारीला हलाल ठरविले आहे. (फत्हुल कदीर) म्हणजे, जर बिस्मिल्लाह् म्हणून गोळी चालवली गेली; आणि शिकार जबाहच्या पूर्वीच मरण पावला, तर त्याचे खाणे या म्हणण्याप्रमाणे हलाल आहे.
१४) मग ते स्वत: पडले असले, किंवा कोणी डोंगरा वरून धक्का देऊन पाडले असेल.
१५) 'नतीहतु' 'मनतुहतु' च्या अर्थात आहे; म्हणजे कोणी त्याला शिंग मारले आणि जबाह केल्याशिवाय ते मरून गेले.
१६) म्हणजे वाघ,चित्ता आणि लांडगा वगैरे सारखे जूनाबने (सुळ्यांनी शिकार करण्याऱ्या श्वापदांमधून कोणी) याला खाल्ले असेल आणि ते मरून गेले असेल. अज्ञान काळात मरून गेल्यावर सुद्धा अशा जनावरांना खाऊन टाकले जात असे.
१७) बहुतेक भाष्यकाराजवळ हे वेगळे करणे, सर्व उल्लेखित जनावराकरीता आहे.म्हणजे मुनखनेका, मवकूज़ा, मुतरद्दिया, नतीहा आणि श्वापदांचे खाल्लेले, जर ते तुम्हास या स्थितीत आढळतील की, त्यांच्यात जिवंत असण्याची चिन्हे दिसत असतील, मग तुम्ही त्यांना धर्मशास्त्राप्रमाणे जबाह करून घ्याल, तर तुमच्यासाठी याचे खाणे हलाल होईल. जिवंत असण्याचे चिन्हे हे आहे की, जबाह करते वेळी जनावराने तडपड करावी आणि लाथा माराव्यात. जर सुरी फिरवतांना ही लक्षणे दिसली नाही तर समजून घ्या हे मृत आहे. जबाहची धर्मशास्त्राने पद्धत ही आहे की, 'बिस्मिल्लाह' म्हणून तेज धार असलेल्या वस्तूंने त्याचा गळा अशा प्रकारे कापण्यात यावा की, नसा कापल्या जाव्या. 'जबाह' शिवाय 'नहर' पण शास्त्राप्रमाणे आहे. ज्याची (नहरची) पद्धत ही आहे की, उभ्या जनावराच्या गळ्यावर सुरी मारली जावी. (उंटाला अशा प्रकारे नहर केले जाते.) ज्याने घाटीच्या आणि रक्ताच्या खास वाहिन्या कापल्या जातात. आणि सर्व रक्त वाहून जाते.
**मशिनने जबाह केलेलेः-** आज काल जे मशीनने जबाह केलेले जनावरांचे मास युरोप वगैरे देशातून येते, ते हलाल नाही. कारण की त्याला धर्मशास्त्रीय पद्धतीने जबाह केले जात नाही. परंतु त्यांत झटका असतो, ज्यामुळे रक्त पूर्ण पणे बाहेर पडत नाही.
१८) मुशरिकीन आपल्या मूर्तीजवळ दगड किंवा एखादी वस्तू गाडून एक खास जागा बनवून घेत, त्याला (नुसुब) स्थान किंवा अस्ताना म्हणतात यावर ते मूर्तींच्या नावावर निर्दीष्ट केलेले जनावर जबाह करीत असत. म्हणजे हा ' व मा उहिल्ल बिही लि गैरिल्लाह' चाच एक प्रकार होता. याच्याने ठाऊक झाले की, स्थान, कबरी आणि दरगाहवर जेथे लोक इच्छापूर्तीसाठी जातात; आणि तेथे दफन झालेल्या व्यक्तींच्या प्रसन्नतेसाठी जनावर कोंबडा बकरा वगैरे जबाह करतात. किंवा शिजवलेले अन्न वाटतात, यांचे खाणे हराम आहे. हे ''वमा जुबेहा 'अलन्नुसुब'' मध्ये दाखल आहे.
१९) ''वअन तस्तक्सिमु बिल अज़लाम'' चे दोन अर्थ केले गेले आहे. एक बाणामार्फत वाटणी करणे, दुसरे बाणांमार्फत भवितव्य माहित करून घेणे. पहिल्या अर्थाच्या आधारांवर सांगण्यात येते की, जुगारी वगैरे मध्ये, जुबाह केलेल्या जनावरांच्या वाटणीकरीता हे बाण असत; त्यांच्यात कोणाला काही मिळून जात असे; कोणी वंचित राहून जात असे. दुसऱ्या अर्थाच्या अनुषंगाने सांगण्यात आले आहे की, 'अज्लाम' ने अभिप्रेत बाण आहेत, ज्याच्याने ते कोण्या कामाची सुरवात करतांना शकून घेत असत. त्यांनी तीन प्रकारचे बाण बनवून ठेवले होते. एक 'इफअल्' (करा) दुसऱ्यात 'ला तफअल्' (करू नका) आणि तिसऱ्यात काहीच नसायचे. 'इफअल्' वाला बाण निघून आला, तर ते काम करून घेण्यात येत असे. 'ला तफअल्' निघाला तर करीत नसत. आणि तिसरा बाण निघाल्यास, तर मग दुसऱ्यादा शकून काढीत. हे पण जणू ज्योतिष आणि अल्लाहशिवाय दुसऱ्यांकडे मदत मागण्याच्या प्रकारात आहे. म्हणून याला पण 'हराम'करून दिले. 'इस्तिक्साम' चा अर्थ दैव जाणून घेणे. म्हणजे बाणांनी दैवत जाणून घेण्याचा प्रयत्न करीत होते.
२०) भुकेच्या अति व्याकूळ करणाऱ्या स्थितीत उल्लेखित निषीद्ध केलेल्या वस्तू खाण्याची परवानगी आहे. या शर्तीवर की, उद्देश अल्लाहचा आज्ञाभंग आणि मर्यादेच्या पुढे जाणे नसावे. फक्त जीव वाचवण्याचा उद्देश असावा.

يَسْـَٔلُوْنَكَ مَاذَآ اُحِلَّ لَهُمْ ؕ قُلْ اُحِلَّ لَكُمُ الطَّيِّبٰتُ ۙ وَمَا عَلَّمْتُمْ مِّنَ الْجَوَارِحِ مُكَلِّبِيْنَ تُعَلِّمُوْنَهُنَّ مِمَّا عَلَّمَكُمُ اللّٰهُ ۫ فَكُلُوْا مِمَّاۤ اَمْسَكْنَ عَلَيْكُمْ وَاذْكُرُوا اسْمَ اللّٰهِ عَلَيْهِ ۪ وَاتَّقُوا اللّٰهَ ؕ اِنَّ اللّٰهَ سَرِيْعُ الْحِسَابِ ④

**आपणास विचारतात की, त्यांच्यासाठी काय काय हलाल आहे? आपण सांगून टाका की, सर्व पाक (साफ) वस्तू तुमच्यासाठी हलाल केल्या गेल्या आहेत[१]; आणि ज्या शिकार करणाऱ्या जनावरांना तुम्ही शिकवून ठेवले आहे; म्हणजे ज्यांना थोडे बहुत ते शिकवतात; ज्याचे शिक्षण अल्लाहने तुम्हास देऊन ठेवले आहे[२]; मग ज्या शिकारींना ते तुमच्याकरीता धरून रोकून ठेवतात, तर त्याला तुम्ही खाऊन घ्या. आणि यावर अल्लाहतआलाचे नामस्मरण करीत जा[३]. आणि अल्लाहतआलाला भित रहा; खचितच् अल्लाहतआला लवकर हिशेब घेणारा आहे ④**

اَلْيَوْمَ اُحِلَّ لَكُمُ الطَّيِّبٰتُ ؕ وَطَعَامُ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ حِلٌّ لَّكُمْ ۪ وَطَعَامُكُمْ حِلٌّ لَّهُمْ ؗ وَالْمُحْصَنٰتُ مِنَ الْمُؤْمِنٰتِ وَالْمُحْصَنٰتُ مِنَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ مِنْ قَبْلِكُمْ اِذَاۤ اٰتَيْتُمُوْهُنَّ اُجُوْرَهُنَّ مُحْصِنِيْنَ غَيْرَ مُسٰفِحِيْنَ وَلَا مُتَّخِذِيْۤ اَخْدَانٍ ؕ وَمَنْ يَّكْفُرْ بِالْاِيْمَانِ فَقَدْ حَبِطَ عَمَلُهٗ ۫ وَهُوَ فِي الْاٰخِرَةِ مِنَ الْخٰسِرِيْنَ ⑤

**सर्व चोख्या वस्तू, आज तुमच्यासाठी हलाल केल्या गेल्यात. आणि ग्रंथधारी लोकांनी जबाह केलेले तुमच्यासाठी हलाल आहे[४]; आणि तुम्ही जबाह केलेले त्यांच्यासाठी हलाल आहे. आणि स्वच्छ चारित्र्याच्या मुसलमान स्त्रिया आणि तुमच्यापूर्वी ज्या लोकांना पुस्तक दिले गेले आहे, त्यांच्या स्वच्छ चारित्र्यांच्या स्त्रियापण हलाल आहेत[५]. जेव्हा की तुम्ही त्यांचे स्त्रीधन (महेर) अदा कराल आणि अशाप्रकारे की, तुम्ही त्यांच्याशी कायदेशीर लग्न करावे. असे नाही की, उघडरित्या व्याभिचार करावे; किंवा गुप्तरित्या बदकर्म करावे; ईमानाला नाकारण्याची कर्मे सर्व अलिप्त आहेत; आणि परलोकांत पण तो हानी सोसणाऱ्यांपैकी होईल ⑤**

१) याच्याने त्या सर्व वस्तू अभिप्रेत आहेत, ज्या हलाल आहेत. प्रत्येक हलाल वस्तू तैय्यब (पाकिज़ा) आहे आणि प्रत्येक हराम वस्तू खबीस (वाईट) आहे.

२) 'जवारेह' 'जारेह' चे अनेक वचन आहे. जे कासिबच्या (कमविणाऱ्याच्या) अर्थात आहे. अभिप्रेत शिकारी कुत्रा,बाज,चित्ता,ससाणा आणि दुसरे शिकारी पक्षी आणि श्वापदे आहेत. ''मुकल्लिबीन' चा अर्थ आहे, शिकारीवर सोडण्यापूर्वी यांना शिकार करणे शिकविले गेले असावे. शिकवण्याचा अर्थ आहे, जेव्हा यांना शिकारीवर सोडले जाईल, तर पळत पळत जाईल, आणि जेव्हा थांबविण्यात येईल, तेव्हा थांबून जावे; आणि बोलविले जाईल तर परत यावे.

३) अशा प्रशिक्षित जनावरांची शिकार केलेले जनावर दोन अटीवर हलाल आहे. एक हे की त्याला शिकारीवर सोडण्यापूर्वी, 'बिसमिल्लाह' म्हणून घेतले गेले असावे. दुसरी ही की, शिकारी जनावर शिकार करून, आपल्या मालकासाठी राखून ठेवीन, आणि त्याचीच प्रतीक्षा करेल. स्वत: त्याने न खावे, येथ पावेतो की त्याने त्याला मारूनच टाकले असावे; तरी सुद्धा ते शिकारी जनावराकडून शिकार झालेले जनावर हलाल राहील. या अटीवर की, याच्या शिकारीत प्रशिक्षित आणि सोडलेल्या जनावराशिवाय आणखी जनावरांचा सहभाग नसावा. (स.बुखारी व स.मुस्लीम)

४) ग्रंथधारी लोकांचे तेच जबाह केलेले जनावर हलाल राहील, ज्यांत रक्त वाहून गेले असेल. म्हणजे यांचे मशीनने जबाह केलेले हलाल नाही. कारण की, रक्त वहावून देण्याची एक पायाभूत अट गायब आहे.

५) ग्रंथधारी लोकांच्या स्त्रियांशी लग्न करण्याच्या परवानगीबरोबर एक तर स्वच्छ चारित्र्याची अट आहे; जी आजकाल बहुतेक (खिस्ती आणि यहूदी) ग्रंथधारी लोकांच्या स्त्रियांमध्ये गायब आहे. दुसरे याच्यानंतर सांगितले की, ज्याने ईमान बरोबर कुफ्र केले त्याचे कर्म बर्बाद होऊन गेले. याच्याने ही तंबी उद्देशीत आहे, जर अशा स्त्रीशी लग्न करण्यांत ईमान बर्बाद होण्याचा अंदेशा असेल तर हा फारच तोट्याचा व्यापार राहिल आणि आजकाल ग्रंथधारी लोकांच्या स्त्रियांशी लग्नांमध्ये ईमानाला जे सख्त धोके संभवतात, त्यांच्या स्पष्टीकरणाची जरूरी नाही. वास्तविक पाहता ईमानाला वाचविणे अनिवार्य (फर्ज) आहे. एका योग्य कामासाठी फर्जला धोक्यात टाकता येत नाही. म्हणून याचे करणे पण त्या वेळेपर्यंत योग्य राहणार नाही, जो पर्यंत चर्चित दोन्ही गोष्टी नदारद होऊन जाणार नाहीत. याशिवाय आजकालचे ग्रंथधारी लोक, तसेपण आपल्या धर्माकडून फारच अनोळखी किंबहुना बंडखोर आहेत. अशा परिस्थितीत काय ते ग्रंथधारी लोकांत धरले जाऊ शकतात? वल्लाह आलम्!

يَاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِذَا قُمْتُمْ اِلَى الصَّلٰوةِ فَاغْسِلُوْا
وُجُوْهَكُمْ وَاَيْدِيَكُمْ اِلَى الْمَرَافِقِ وَامْسَحُوْا بِرُءُوْسِكُمْ
وَاَرْجُلَكُمْ اِلَى الْكَعْبَيْنِ ۭ وَاِنْ كُنْتُمْ جُنُبًا فَاطَّهَّرُوْا ۭ
وَاِنْ كُنْتُمْ مَّرْضٰٓى اَوْ عَلٰي سَفَرٍ اَوْ جَاۗءَ اَحَدٌ مِّنْكُمْ
مِّنَ الْغَاۗىِٕطِ اَوْ لٰمَسْتُمُ النِّسَاۗءَ فَلَمْ تَجِدُوْا مَاۗءً
فَتَيَمَّمُوْا صَعِيْدًا طَيِّبًا فَامْسَحُوْا بِوُجُوْهِكُمْ وَاَيْدِيْكُمْ
مِّنْهُ ۭ مَا يُرِيْدُ اللّٰهُ لِيَجْعَلَ عَلَيْكُمْ مِّنْ حَرَجٍ وَّلٰكِنْ
يُّرِيْدُ لِيُطَهِّرَكُمْ وَلِيُتِمَّ نِعْمَتَهٗ عَلَيْكُمْ لَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ۝ ٦

**हे ईमानवाल्यांनो! जेव्हा तुम्ही नमाजीसाठी उठा, तेव्हा आपल्या तोंडांना, आणि आपल्या हातांना कोपरासमवेत धुवून घ्या[१]; आपल्या डोक्यांना ओल्या हाताने चोळा[२], आणि आपल्या पायांना घोट्यासह धुवून घ्या[३]. आणि जर तुम्ही (स्त्री समागमाने किंवा विर्यपतनाने) विटाळला असाल, तर स्नान करून घ्या[४]. हा! परंतु जर तुम्ही आजारी असाल, किंवा प्रवासात असाल किंवा तुमच्यातून कोणी शौच कुपाहून जाऊन आला असेल, किंवा तुम्ही स्त्रियांशी समागम केला असेल, आणि तुम्हांस पाणी मिळणार नाही. तर स्वच्छ मातीने 'तयम्मुम' करून घ्या. तिला आपल्या चेहऱ्यावर आणि हातावर चोळून घ्या[५]. अल्लाहतआला तुम्हास कसलीच अडचण करू इच्छित नाही[६]. किंबहुना त्याचा इरादा, तुम्हास पाक (साफ) करण्याचा आणि तुम्हास आपल्या भरपूर देणग्या देण्याचा आहे[७]. कारण तुम्ही (त्याचे) आभार मानत रहावे ⑥**

१) 'तोंड धुवा' (वजू करणे) म्हणजे एक एक, दोन दोन किंवा तीन तीन वेळा दोन्ही तळहात धुणे, गुळण्या करणे, नाकात पाणी टाकून शिंकरल्यानंतर जसे की, हदीसने सिद्ध आहे, तोंड धुतल्यानंतर हातांना कोपरासमवेत धुतले जावे.

२) मसह (डोके चोळणे) सर्व डोक्याचा केला जावा; जसे की, हदीसने सिद्ध आहे. आपले हात पुढून मागे, डोक्याच्या मागच्या भागापर्यंत घेऊन जावे, आणि मग तेथून पुढे घेऊन यावे, जेथून सुरू केले होते. त्याच्या बरोबर कानांचा 'मसह' (चोळणे) करून घ्यावा. जर डोक्यावर पगडी किंवा फेटा असेल तर हदीसीप्रमाणे मोज्याप्रमाणे त्यांच्यावर सुद्धा 'मसह' करणे योग्य आहे. या अटीवर की ती पगडी मोजा किंवा फेटा वजू केल्यानंतर घातले गेले आसावे. (स.मुस्लीम किताबुत् तहारत) यांच्यावर फक्त एक वेळेला मसह करणे पुरेसे आहे. इमाम शौकानी जवळ डोक्याच्या काही भागाचा मसह करून घेणे पण पुरेसा आहे. परंतु इमाम इब्ने कसीरने याला बरोबर नसल्याचे सांगितले आहे. (इब्ने कसीर)

३) म्हणजे आपले पाय घोट्यापर्यंत धुवां; आणि जर मोजे घातलेले असतील (अट अशी की वजू असलेल्या स्थितीत घातली असतील) तर हदसीसच्या अनुषंगाने पाय धुण्याऐवजी मोज्यावर 'मसह' पण योग्य आहे.

**मलहुजा:** (अ)जर पूर्वीच वजू केलेला असेल, तर नवा वजू करणे आवश्यक नाही. तथापि प्रत्येक नमाजीसाठी ताजा वजू करणे चांगले आहे. (ब) वजूच्या पूर्वी नियत करणे अनिवार्य आहे (क) वजूच्या पूर्वी बिस्मिल्लाह पढणे पण आवश्यक आहे. (ड) दाढी घनदाट असेल तर तिचा 'खिलाल' (दाढीतून बोटे फिरविणे) केला जावा. (इ) अवयवांना क्रमवार धुतले जावे (ई) त्यांच्यात अंतर न ठेवले जावे म्हणजे एक अवयव धुतल्यानंतर, दुसरा अवयव धुण्यांत वेळ न केली जावी. किंबहुना सर्व अवयव एका नंतर एक क्रमवार, धुतले जावेत (उ) वजूच्या अवयवांमधून कोण्याही अवयवांचा कोणताही भाग कोरडा रहावयास नको; नाहीतर वजू होणार नाही. (ऊ) कोणताही अवयव तीनपेक्षा जास्त वेळ धुतला जाऊ नये; असे करणे सुन्नतच्या विरूद्ध आहे. (तफसीर इब्ने कसीर, फत्हुल कदीर आणि अयसरुत्तफासीर)

४) जनाबत ने अभिप्रेत ती अस्वच्छता (नापाकी) आहे; जी विर्यपतन किंवा पत्नीशी संभोग केल्यानंतर येते. आणि याच हुकूमात ऋतुस्त्राव आणि प्रसुतीनंतर विटाळ पण दाखल होतो; जेव्हा ऋतुस्त्राव किंवा प्रसुतीनंतरचे रक्त बंद होऊन जाईल. तर पाक साफ होण्यासाठी तहारत म्हणजे स्नान करणे आवश्यक आहे. तथापि पाणी न मिळाल्यास, 'तयम्मुम' ची परवानगी आहे, जसे की, हदीसने सिद्ध आहे. (फत्हुल कदीर व अयसरूत्तफासीर)

५) याचा थोडक्यात खुलासा आणि 'तयम्मुम' ची पद्धत सू.निसा च्या आ.क्र.४३ मध्ये येऊन चुकला. स.बुखारीमध्ये याच्या अवतरण्याच्या कारणात येते की, एका प्रवासात बयदा या ठिकाणी ह.आयशा ؓ चा हार हरवून गेला. ज्यामुळे तेथे थांबले किंवा थांबावे लागले. सकाळी नमाजसाठी, लोकांजवळ पाणी नव्हते; आणि शोध घेतला असता, पाणी पण मिळाले नाही. याप्रसंगी हे महावाक्य अवतीर्ण झाले; ज्यात 'तयम्मुम' ची परवानगी देण्यात आली आहे. ह.उसैद बिन हुजैर ؓ नी हे महावाक्य ऐकून म्हटले, हे अबुबकरच्या मुली! तुमच्यामुळे अल्लाहने लोकांसाठी बरकती अवतरीत केल्या आहेत. आणि ही काही तुमची पहली बरकत नाही. (तुम्ही लोकांसाठी बरकतच बरकत आहात) (स.बुखारी)

६) या करीता 'तयम्मुम' ची परवानगी देण्यात आली आहे.

७) याच्याकरीता हदीसमध्ये वजू केल्यानंतर दुआ करण्याला सांगण्यात आले आहे. दुआंच्या पुस्तकातून ही दुआ पाठ करून घेतली जावी.

وَاذْكُرُوا نِعْمَةَ اللَّهِ عَلَيْكُمْ وَمِيثَاقَهُ الَّذِي وَاثَقَكُم بِهِ إِذْ قُلْتُمْ سَمِعْنَا وَأَطَعْنَا ۖ وَاتَّقُوا اللَّهَ ۚ إِنَّ اللَّهَ عَلِيمٌ بِذَاتِ الصُّدُورِ ﴿٧﴾

तुमच्यावर अल्लाहतआलाच्या ज्या देणग्या अवतरीत झाल्या आहेत, त्यांना आठवणीत असू द्या. आणि त्या वचनाला पण ज्याचा तुमच्याशी करार झाला आहे; जेव्हा की तुम्ही सांगितले, आम्ही ऐकले आणि मान्य केले आणि अल्लाहतआलाला भित रहा. निश्चितच अल्लाहतआला अंत:करणातील गोष्टी जाणतो (७)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا كُونُوا قَوَّامِينَ لِلَّهِ شُهَدَاءَ بِالْقِسْطِ ۖ وَلَا يَجْرِمَنَّكُمْ شَنَآنُ قَوْمٍ عَلَىٰ أَلَّا تَعْدِلُوا ۚ اعْدِلُوا هُوَ أَقْرَبُ لِلتَّقْوَىٰ ۖ وَاتَّقُوا اللَّهَ ۚ إِنَّ اللَّهَ خَبِيرٌ بِمَا تَعْمَلُونَ ﴿٨﴾

हे ईमानवाल्यांनो! तुम्ही अल्लाहसाठी हक (सत्य) वर कायम रहा आणि न्यायाला धरून साक्ष देणारा बनून जा[१]. कोण्या समाजाचे शत्रुत्व तुम्हास न्यायाविरूद्ध काम करण्यावर प्रवृत्त न करो.[२]! न्याय करीत चला, जो सदाचरणाच्या जास्त जवळ आहे; आणि अल्लाहतआलाला भीत रहा; विश्वास ठेवा की, अल्लाहतआला तुमच्या कर्मांना जाणणारा आहे (८)

وَعَدَ اللَّهُ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ ۙ لَهُم مَّغْفِرَةٌ وَأَجْرٌ عَظِيمٌ ﴿٩﴾

अल्लाहतआलाचा वायदा आहे की, जो ईमान आणेल आणि चांगली कामे केली; त्यांचेसाठी फारच मोठी क्षमा आणि फार मोठे पुण्य प्रतिफळ आहे (९)

وَالَّذِينَ كَفَرُوا وَكَذَّبُوا بِآيَاتِنَا أُولَٰئِكَ أَصْحَابُ الْجَحِيمِ ﴿١٠﴾

आणि ज्या लोकांनी नाकारले, आणि आमच्या आदेशांना खोटे ठरविले; ते नरकाग्नीत जाणारे आहेत (१०)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا اذْكُرُوا نِعْمَتَ اللَّهِ عَلَيْكُمْ إِذْ هَمَّ قَوْمٌ أَن يَبْسُطُوا إِلَيْكُمْ أَيْدِيَهُمْ فَكَفَّ أَيْدِيَهُمْ عَنكُمْ ۖ وَاتَّقُوا اللَّهَ ۚ وَعَلَى اللَّهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُؤْمِنُونَ ﴿١١﴾

हे ईमानवाल्यानो! अल्लाहतआलाने तुमच्यावर जो उपकार केला आहे, त्याला आठवा; जेव्हा की एका समूहाने तुमच्यावर हात टाकण्याचा प्रयत्न केला आहे ; तर अल्लाहतआलाने त्यांच्या हातांना तुमच्यापर्यंत पोहचण्याला रोखून दिले[३]. आणि अल्लाहतआलाला भित रहा; आणि मोमिनांनी अल्लाहतआलावरच भरोसा केला पाहिजे (११)

१-२) पहिल्या महावाक्याचा खुलासा सू.निसा आ.क्र.१३५ मध्ये आणि दुसऱ्या महावाक्याचा सू.माइद:च्या सुरवातीला येऊन चुकला आहे. नबी करीम ﷺ च्या जवळ, न्यायपूर्ण साक्षीचे किती महत्त्व आहे, याची कल्पना त्या घटनेने येते, जी हदीसमध्ये येते. ह.नोअमान बिन बशीर ﷺ म्हणतात की, माझ्या वडीलांनी मला काही भेट दिली; तेव्हा माझी आई म्हणाली, या भेटीवर जोपर्यंत तुम्ही अल्लाहच्या पैगंबरांना साक्षीदार बनवून घेणार नाही; तोपर्यंत माझे समाधान होणार नाही. म्हणून माझे वडील, नबी ﷺ च्या सेवेत हजर झाले. तर त्यांनी विचारले की, काय तुम्ही आपल्या सर्व संततीला अशा प्रकारची भेट दिली आहे? त्यांनी नकारात्मक उत्तर दिले. तेव्हा आपण ﷺ फर्माविले 'अल्लाहला भ्या; आणि संततीमध्ये न्याय करा.'' आणि सांगितले की, ''मी अन्यायावर साक्षीदार होणार नाही.'' (स.बुखारी व स.मुस्लीम)

३) याच्या अवतरण्याच्या कारणात भाष्यकारांनी निरनिराळ्या गोष्टी सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ त्या आराबीची गोष्ट, की रसूल ﷺ एका प्रवासावरून परतीच्या वेळी एका झाडाखाली सावलीत आराम करीत होते; तलवार वृक्षाला टांगली होती. त्या आराबीने ती तलवार धरून आपण ﷺ वर उगारीली आणि म्हणू लागला हे मुहम्मद ﷺ आपणांस माझ्यापासून कोण वाचवील? आपण ताबडतोब सांगितले, ''अल्लाह'' (म्हणजे अल्लाह वाचवील) हे म्हटलेच होते की तलवार त्याच्या हातातून पडून गेली. काही म्हणतात की, कअब बिन अशरफ आणि त्याच्या साथीदारांनी नबी करीम ﷺ आणि आपल्या सहाबांच्या विरोधांत जेव्हा की आपण तेथे होते, धोका आणि फसवणूकीने नुकसान पोहचविण्याचे कारस्थान केले होते. ज्याच्यापासून अल्लाहतआलाने आपणास वाचविले. काही म्हणतात की, एका मुसलमानाच्या हातून चुकीने, जी दोन आमरी माणसे ठार झाली होती; त्यांच्या प्राणमुल्याचा मोबदला देण्यात यहूद्यांचे घराणे 'बनु नजीर' बरोबर झालेल्या कराराप्रमाणे जे सहकार्य घ्यावयाचे होते, त्यासाठी नबी करीम ﷺ आपल्या साथीदारासमवेत तेथे गेले आणि एका भिंतीशी टेक लाऊन बसले. त्यांनी असे कारस्थान केले की, वरून आपणावर जात्याचा दगड पाडून देण्यांत यावा. ज्यांची अल्लाहतआलाने आपणांस वह्यद्वारे सूचना देऊन दिली. शक्य आहे की, या साऱ्या प्रसंगानंतर हे महावाक्य अवतरीत झाले असावे. कारण की, एका महावाक्याच्या अवतरणासाठी कित्येक सबबी आणि अनेक कारणे असू शकतात. (तफसीर इब्ने कसीर, अयसरूत्तफासीर आणि फत्हुल कदीर)

وَلَقَدْ اَخَذَ اللّٰهُ مِيْثَاقَ بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ ۚ وَبَعَثْنَا
مِنْهُمُ اثْنَيْ عَشَرَ نَقِيْبًا ۭ وَقَالَ اللّٰهُ اِنِّىْ مَعَكُمْ ۭ
لَىِٕنْ اَقَمْتُمُ الصَّلٰوةَ وَاٰتَيْتُمُ الزَّكٰوةَ وَاٰمَنْتُمْ
بِرُسُلِيْ وَعَزَّرْتُمُوْهُمْ وَاَقْرَضْتُمُ اللّٰهَ قَرْضًا حَسَنًا
لَّاُكَفِّرَنَّ عَنْكُمْ سَيِّاٰتِكُمْ وَلَاُدْخِلَنَّكُمْ جَنّٰتٍ
تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ ۚ فَمَنْ كَفَرَ بَعْدَ ذٰلِكَ
مِنْكُمْ فَقَدْ ضَلَّ سَوَاۗءَ السَّبِيْلِ ﴿١٢﴾

**आणि अल्लाहतआलाने बनी इस्राईलकडून पक्के वचन घेतले(१); आणि त्यांच्यातूनच बारा सरदार आम्ही निश्चित केले(२). आणि अल्लाहतआलाने सांगून टाकले की, खचितच् मी तुमच्या बरोबर आहे, जर तुम्ही नमाज कायम कराल, आणि जकात देत रहाल, आणि माझ्या पैगंबरांना मानत रहाल, आणि त्यांची मदत करत रहाल, आणि अल्लाहतआलाला चांगले कर्ज देत रहाल, तर खचितच् मी तुमची वाईट कामे तुमच्यापासून दूर ठेवीन; आणि तुम्हास अशा स्वर्गाच्या बागांत घेऊन जाईल, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वाहत असतील. मग जर या पक्के वचन घेतल्यानंतर सुद्धा तुमच्यातून जो फिरून जाईल, तर तो खचितच् योग्य मार्गावरून भटकून गेला ⑫**

فَبِمَا نَقْضِهِمْ مِّيْثَاقَهُمْ لَعَنّٰهُمْ وَجَعَلْنَا قُلُوْبَهُمْ
قٰسِيَةً ۚ يُحَرِّفُوْنَ الْكَلِمَ عَنْ مَّوَاضِعِهٖ ۙ وَنَسُوْا
حَظًّا مِّمَّا ذُكِّرُوْا بِهٖ ۚ وَلَا تَزَالُ تَطَّلِعُ عَلٰي خَاۗىِٕنَةٍ
مِّنْهُمْ اِلَّا قَلِيْلًا مِّنْهُمْ فَاعْفُ عَنْهُمْ وَاصْفَحْ ۭ اِنَّ
اللّٰهَ يُحِبُّ الْمُحْسِنِيْنَ ﴿١٣﴾

**मग त्यांच्या वचनभंगाच्या कारणाने, आम्ही त्यांना शापित केले; आणि त्यांची अंत:करणे कठीण करून टाकलीत; की ते (अल्लाहच्या) वाणीला तिच्या जागेवरून बदलून टाकतात(३); आणि जो काही उपदेश त्यांना केला गेला होता,त्याचा फार मोठा भाग विसरून गेले(४). त्यांच्या एक न एक लबाडीची सूचना आपणास मिळतच राहील(५), परंतु थोडेसे असे देखील नाहीत(६). आपण त्यांना क्षमा करीत रहा, आणि (त्यांच्याकडे) दुर्लक्ष करीत रहा(७); नि:संशय अल्लाहतआला उपकार करणाऱ्यांना मित्र राखतो ⑬**

وَمِنَ الَّذِيْنَ قَالُوْٓا اِنَّا نَصٰرٰٓى اَخَذْنَا مِيْثَاقَهُمْ فَنَسُوْا
حَظًّا مِّمَّا ذُكِّرُوْا بِهٖ ۠ فَاَغْرَيْنَا بَيْنَهُمُ الْعَدَاوَةَ وَالْبَغْضَاۗءَ
اِلٰي يَوْمِ الْقِيٰمَةِ ۭ وَسَوْفَ يُنَبِّئُهُمُ اللّٰهُ بِمَا كَانُوْا
يَصْنَعُوْنَ ﴿١٤﴾

**आणि जे स्वत:ला खिस्ती म्हणवतात(८), आम्ही त्यांच्या कडून सुद्धा पक्के वचन घेतले; हे सुद्धा याचा मोठा भाग विसरून गेले. जो यांना उपदेश केला गेला होता; तर आम्ही सुद्धा त्यांच्या आपसात द्वेष आणि शत्रुत्व टाकून दिले, जे कयामतपर्यंत राहील(९). आणि जे काही करीत होते, लवकरच अल्लाहतआला त्यांना सर्व दाखवून देईल ⑭**

१) जेव्हा अल्लाहतआलाने मोमिनांना ते वचन आणि करार पूर्ण करण्याची ताकीद केली, जो त्याने ह.मुहम्मद ﷺ च्या मार्फत घेतला होता. आणि त्यांना सत्यावर अडिग राहण्याचा आणि न्यायपूर्ण साक्ष देण्याचा हुकूम दिला; आणि त्यांना त्या बक्षीसांची आठवण करून दिली; जे त्यांना जाहीरपणे आणि गुप्तपणे देण्यात आले; आणि विशेष ही गोष्ट की त्यांना सत्य आणि पुण्याच्या मार्गावर चालण्याची सुबुद्धी दिली. तेव्हा आता या ठिकाणी त्या वचनाचे वर्णन करण्यात येत आहे, जे बनी इस्राईलकडून घेण्यात आले, आणि ज्यांच्यात ते अयशस्वी राहिले. ही जणू त्या अनुषंगाने मुसलमानांना तंबी आहे, की तुम्ही सुद्धा कोठे बनु इस्राईल प्रमाणे वचन व कराराला पायाखाली तुडविणे सुरू न करून द्यावे.

२) ही त्यावेळची घटना आहे, जेव्हा ह.मूसा عليه السلام 'जबाबरा' हून युद्धासाठी तयार झाले, तेव्हा त्यांनी आपल्या समाजाचे बारा घराण्यावर बारा सरदार निश्चित करून दिले की, त्यांनी त्यांना युद्धासाठी तयारपण करावे, त्यांना मार्गदर्शनपण करावे आणि दुसऱ्या गोष्टींची व्यवस्थापण करावी.

३) म्हणजे इतक्या व्यवस्था, वचन, करार असून सुद्धा बनु इस्राईलने करार भंग केला. ज्यामुळे ते अल्लाहकडून शापित झाले. या शापाचे ऐहिक परिणाम हे समोर आले की, एक त्यांची अंत:करणे कठीण करून दिली गेली. ज्यामुळे त्यांची अंत:करणे परिणाम घेण्यापासून वंचित होऊन गेली. आणि पैगंबरांचे बोलणे आणि हितोपदेश त्यांच्यासाठी निरर्थक होऊन गेलेत. दुसरे हे की, ते अल्लाहच्या वाणीत फेरबदल करू लागले. हा फेरबदल शाब्दिक आणि आर्थिक दोन्ही प्रकारचा होत असे. जो या गोष्टीचा पुरावा होता की, त्यांच्या बुद्धीत आणि जाणिवेत वक्रता आलेली आहे. आणि त्यांच्या हिंमतीत इतकी वाढ होऊन गेली आहे की, अल्लाहच्या महावाक्यात ढवळाढवळ करतांना त्यांना काहीच वाटत नसे. दुर्दैवाने या अंत:करणाच्या खराबीने आणि अल्लाहच्या वाणीत

फेरबदल करण्यापासून उम्मते मुहम्मदी च्या काही व्यक्तीदेखील सुरक्षित राहिल्या नाहीत. मुसलमान म्हणवणारी सर्व साधारण जनताच नाही, खास लोकांपासून, जाहीलच (अडाणी) नाही, तर धर्मपंडितसुद्धा अशा स्थानांवर पोहचून चुकले आहेत; की हितोपदेश आणि अल्लाहच्या आदेशांची आठवण करून देणे, त्यांच्यासाठी निरर्थक आहे. ते ऐकूण जरापण परिणाम कबूल करीत नाहीत. आणि ज्या सुस्ती आणि कोताहीमध्ये ते पडले आहेत, त्यापासून तौबा करीत नाहीत. अशाच प्रकारे आपल्या बिदअती, स्वत: घडविलेले आपले गुमान आणि आपल्या चुकीचा भासवर जमून जाण्याच्या पुराव्यासाठी त्यांना अल्लाहच्या कलाममध्ये हेरफेर करण्यात काहीच वाटत नाही. ते आवश्यकते प्रमाणे मोठ्या जोरात हे कामपण करून टाकतात. शाब्दिक फेरबदलाची दोन उदाहरणे तर आम्ही सू.निसा च्या आ. क्र.७७ च्या खाली सादर करून चुकलो आहोत. (अशा प्रकारचे शाब्दिक हेरफेर हदीसीमध्ये सुद्धा केली गेली आहेत) आणि आर्थिक फेरबदलाची तर काही गणतीच नाही. याच्यासाठी खास म्हणून मौलाना अहमद रजा खान चे कुरआनाचे भाष्यांतर, ''कंजुल ईमान'' आणि त्याचा समास पाहून घेणे पुरेसे आहे. ज्यांच्यात अनेक ठिकाणी या यहूदी कर्तृत्वाची पुनरावृत्ती करण्यात आली आहे.

४) हा तिसरा परिणाम आहे. आणि त्याचा अर्थ आहे की, अल्लाहच्या आदेशांवर अंमलबजावणी करण्यात त्यांना काही उत्साह आणि आवड राहिली नाही; किंवा कर्महिनता आणि दुष्कृत्यता ही त्यांची पद्धत होऊन गेली होती. आणि त्यांना इतकी उतरती कळा आली की, न त्यांची अंत:करणे साधी आणि स्वच्छ राहिली न त्यांचा स्वभाव सरळ राहिला.

५) म्हणजे लबाड्या आणि टिंगल टवाळी, त्यांच्या कर्तृत्वाचा एक भाग बनून गेला आहे. ज्यांचे नमुने नेहमी आपल्यासमोर येत राहतील

६) हे थोडेसे लोक तेच आहेत, जे यहूद्यांमधून मुसलमान होऊन गेले होते. आणि त्यांची संख्या दहापेक्षा ही कमी होती.

७) 'विसरा आणि क्षमा करा' हा हुकूम तेव्हा देण्यात आला होता; जेव्हा लढाईची परवानगी नव्हती. नंतर या जागी हुकूम देण्यांत आला, ''त्या लोकांशी युद्ध करा. जे अल्लाहवर आणि शेवटच्या दिवसावर ईमान ठेवीत नाही.'' (सू. तौबा -२९) काहींच्या मते 'क्षमा करा आणि विसरा' चा हुकूम रद्द झालेला नाही. हा स्वत:च एक महत्त्वाचा हुकूम आहे. परिस्थिती आणि आवश्यकतेनुसार याचा पण अंगिकार केला जाऊ शकतो. आणि याच्याने सुद्धा काही वेळा, ते परिणाम भेटून जातात, ज्यांच्यासाठी युद्धाचा हुकूम आहे.

८) 'नसारा' 'नुसरत' (मदत) पासून आहे. हा. ह.ईसा عليه السلام च्या प्रश्नांत ''मन अन्सारी इल्ल्लाह'' (अल्लाहच्या धर्मात कोण माझा मदतगार आहे?) च्या उत्तरात त्यांच्या काही प्रामाणिक अनुयायांनी उत्तर दिले, ''आम्ही अल्लाहचे मददगार आहोत.'' यापासून नसारा शब्द अस्तित्वात आला. हे पण यहूद्यांप्रमाणे ग्रंथधारी आहेत. यांचे कडून सुद्धा अल्लाहने वचन घेतले, परंतु यांनी पण त्या वचनाची पर्वा केली नाही. याच्या परिणामांत त्यांची अंत:करणे परिणाम घेण्यापासून रिक्त आणि त्यांचे कर्तृत्व पोकळ होऊन गेले.

९) हे अल्लाहला दिलेल्या वचनापासून फिरून जाणे आणि कर्महिनतेची ती शिक्षा आहे, जी अल्लाहतआलाकडून त्यांच्यावर कयामतच्या दिवसापर्यंत लादली गेली. म्हणून ख्रिस्त्यांचे कित्येक पंथ आहेत; जे एक दुसऱ्याचा फारच तिरस्कार आणि द्वेष करतात; आणि एक दुसऱ्याला काफिरचा फतवा देतात. आणि एक दुसऱ्याच्या उपासनागृहात उपासना करीत नाही. असे वाटते की, ''उम्मते मुसलेमा'' वर पण ही शिक्षा लादून देण्यात आली आहे. ही उम्मत पण कित्येक पंथात विभागली गेली आहे. ज्यांच्या दरम्यान तिव्र मतभेद आणि तिरस्कार व द्वेषाच्या भिंती उभ्या आहेत.

يَٰٓأَهۡلَ ٱلۡكِتَٰبِ قَدۡ جَآءَكُمۡ رَسُولُنَا يُبَيِّنُ لَكُمۡ كَثِيرٗا مِّمَّا كُنتُمۡ تُخۡفُونَ مِنَ ٱلۡكِتَٰبِ وَيَعۡفُواْ عَن كَثِيرٖۚ قَدۡ جَآءَكُم مِّنَ ٱللَّهِ نُورٞ وَكِتَٰبٞ مُّبِينٞ ﴿١٥﴾

**अहो ग्रंथधारी लोकांनो! खचितच् तुमच्याजवळ आमचा पैगंबर (सल्ल.) येऊन चुकला; जो तुमच्यासमोर अल्लाहच्या पुस्तकातील भरपूर अशा गोष्टी जाहीर करीत आहे, ज्यांना तुम्ही लपवित होता(१). आणि पुष्कळशा गोष्टींकडे दुर्लक्ष करतो. तुमच्याजवळ अल्लाहतआलाकडून (एक तेजपुंज) प्रकाश आणि स्पष्ट पुस्तक येऊन चुकले आहे(२) ⑮**

يَهۡدِي بِهِ ٱللَّهُ مَنِ ٱتَّبَعَ رِضۡوَٰنَهُۥ سُبُلَ ٱلسَّلَٰمِ وَيُخۡرِجُهُم مِّنَ ٱلظُّلُمَٰتِ إِلَى ٱلنُّورِ بِإِذۡنِهِۦ وَيَهۡدِيهِمۡ إِلَىٰ صِرَٰطٖ مُّسۡتَقِيمٖ ﴿١٦﴾

**ज्याच्या मार्फत अल्लाहतआला त्यांना जे आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेचे इच्छुक आहेत, सुरक्षिततेचे मार्ग दाखवित आहे; आणि आपल्या मर्जीने अंधकारातून काढून प्रकाशाकडे घेऊन जातो. आणि योग्य मार्गाकडे त्यांना मार्गदर्शन करतो ⑯**

لَّقَدۡ كَفَرَ ٱلَّذِينَ قَالُوٓاْ إِنَّ ٱللَّهَ هُوَ ٱلۡمَسِيحُ ٱبۡنُ مَرۡيَمَۚ قُلۡ فَمَن يَمۡلِكُ مِنَ ٱللَّهِ شَيۡـًٔا إِنۡ أَرَادَ أَن يُهۡلِكَ ٱلۡمَسِيحَ ٱبۡنَ مَرۡيَمَ وَأُمَّهُۥ وَمَن فِي ٱلۡأَرۡضِ جَمِيعٗاۗ وَلِلَّهِ مُلۡكُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلۡأَرۡضِ وَمَا بَيۡنَهُمَاۚ يَخۡلُقُ مَا يَشَآءُۚ وَٱللَّهُ عَلَىٰ كُلِّ شَيۡءٖ قَدِيرٞ ﴿١٧﴾

**खचितच् ते लोक 'काफिर' होऊन गेले, ज्यांनी म्हटले की, अल्लाहच मसीह इब्ने मर्यम आहे. आपण त्यांना सांगून टाका की, जर अल्लाहतआला मसीह इब्ने मर्यम, आणि त्याची आई, आणि जेवढे लोक भूतलावर आहेत, त्या सर्वांचा संहार करूं इच्छेल तर असा कोण आहे ज्याची अल्लाहपुढे काहीही सत्ता चालत असेल?आकाश आणि पृथ्वी, आणि दोहोंच्या दरम्यानचे सर्व राज्य अल्लाहचेच आहे; तो (जसे) इच्छितो (तसे) निर्माण करतो. आणि अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे(३) ⑰**

१) म्हणजे त्यांनी तौरात व इंजील मध्ये जे बदल आणि जी घालघुसळ केली, त्यांना जाहीर केले. आणि ज्याला ते लपवित होते, त्याला जाहीर केले. जशी धोंडमाराची शिक्षा. जशी की हदीसीमध्ये याचा तपशील उपस्थित आहे.

२) नूर आणि किताबे मुबीन दोहोंनी अभिप्रेत कुरआन करीम आहे. ज्याचा स्पष्ट पुरावा कुरआन करीमची पुढची आयत आहे; ज्यात सांगण्यात येत आहे, ''की याच्यामार्फत अल्लाहतआला मार्गदर्शन करतो.'' जर प्रकाश आणि पुस्तक या दोन वेगवेगळ्या गोष्टी असत्या तर शब्द,'' अल्लाहतआला या दोहो मार्फत मार्गदर्शन करतो'' असे असते. कुरआन करीमच्या या 'नस्स' ने (पक्क्या अर्थाचे महावाक्य) स्पष्ट होऊन गेले की, नूर आणि किताबे मुबीन दोहोने अभिप्रेत एकच गोष्ट म्हणजे कुरआन करीम आहे. असे नाही की, नूरने आँ हजरत ﷺ आणि पुस्तकाने कुरआन करीम अभिप्रेत आहेत. जसे की अहले बिदअत श्रद्धा बाळगतात. त्यांनी नबी ﷺ च्या बाबतीत 'नुरून,मिन नुरिल्लाह्' ची श्रध्दा घडवून ठेवली आहे. आणि आपले ﷺ चे मनुष्य होण्याला नाकारतात. त्याचप्रमाणे या घरातच बनविलेल्या श्रद्धेच्या पुराव्यासाठी एक हदीसपण वर्णन करतात, की, अल्लाहने सर्वात प्रथम नबी ﷺ चा नूर निर्माण केला; आणि मग त्या नूरपासून सारे ब्रह्मांड निर्माण केले. वास्तविक ही हदीस हदीसच्या कुठल्याही अधिकृत संग्रहात आढळून येत नाही. याशिवाय हे त्या सही हदीसच्यापण विरूद्ध आहे, ज्यात नबी करीम ﷺ नी फरमाविले की, ''अल्लाहतआलाने, सर्व प्रथम कलम (लेखणी) निर्माण केली.'' ही रिवायत तिर्मिझी आणि अबुदाऊद मध्ये आहे. मुहद्दीस अलबानी लिहीतात, की, प्रसिध्द हदीस ''अल्लाहने सर्व प्रथम तुझ्या नबी करीम ﷺ चा नूर निर्माण केला,'' ही गोष्ट खोटी आहे.'' (तालिकातुल मिश्कात)

३) या महावाक्यात अल्लाहतआलाने आपल्या परिपूर्ण सामर्थ्याचा आणि सर्व वस्तूंचे मालक होण्याचे वर्णन केले आहे. उद्देश खिस्त्यांच्या मसीहचे उपास्य होण्याच्या श्रद्धेचे खंडन आहे. हजरत मसीह عليه السلام चे अल्लाह आहे, असे मानणारे पहिले तर फार थोडेसे लोक होते; म्हणजे एकच पंथ, 'याकुबियाह' चा हा अकीदा होता. परंतु आता जवळ जवळ सर्व खिस्ती मसीह चे उपास्य होण्याला काही ना काही प्रमाणात मानतात. म्हणूनच खिस्त्यांमध्ये आतां, तीन उपास्य किंवा तिघातून एक, या श्रद्धेला पायाभूत महत्त्व प्राप्त झाले आहे. तथापि कुरआनाने या ठिकाणी स्पष्ट शब्दात सांगून टाकले की, पैगंबर आणि रसूलला अल्लाहच्या वैशिष्ट्यांनी युक्त ठरविणे स्पष्ट आणि खुले कुफ्र आहे. या कुफ्रचा अंगिकार खिस्त्यांनी मसीह ला अल्लाह ठरवून केला. जर कुणी दुसरा गट किंवा पंथ कोण्या दुसऱ्या पैगंबराला मनुष्य आणि पैगंबरीच्या स्थानावरून उचलून परमेश्वर जागेवर स्थानापन्न करेल, तर तो सुद्धा या 'कुफ्र' चा अंगिकार करील. ''फनाउजो बिल्लाह मिन हाज़ेहील अकीदतल फासिदह''!

وَقَالَتِ الْيَهُودُ وَالنَّصٰرٰى نَحْنُ اَبْنٰٓؤُا اللّٰهِ وَاَحِبَّآؤُهٗ ؕ
قُلْ فَلِمَ يُعَذِّبُكُمْ بِذُنُوْبِكُمْ ؕ بَلْ اَنْتُمْ بَشَرٌ مِّمَّنْ
خَلَقَ ؕ يَغْفِرُ لِمَنْ يَّشَآءُ وَيُعَذِّبُ مَنْ يَّشَآءُ ؕ
وَلِلّٰهِ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا ۫ وَاِلَيْهِ
الْمَصِيْرُ ﴿١٨﴾

**यहूदी आणि ख्रिस्ती म्हणतात की, आम्ही अल्लाहचे पुत्र आणि त्याचे प्रिय आहोत[१]. आपण सांगून टाका, की मग तुम्हाला तुमच्या अपराधांबद्दल अल्लाह का शिक्षा देतो[२]? नाही, किंबहुना तुम्ही सुद्धा त्याच्या निर्मितीमधून एक मनुष्य आहात; तो ज्याला इच्छितो, (त्याला) क्षमा करून टाकतो; आणि ज्याला इच्छितो, त्याला शिक्षा करतो[३]; पृथ्वी आणि आकाश आणि त्यांच्या दरम्यानची प्रत्येक वस्तू, अल्लाहतआलाच्याच मालकीची आहे. आणि त्याच्याचकडे परतून जाणे आहे ⑱**

يٰٓاَهْلَ الْكِتٰبِ قَدْ جَآءَكُمْ رَسُوْلُنَا يُبَيِّنُ لَكُمْ
عَلٰى فَتْرَةٍ مِّنَ الرُّسُلِ اَنْ تَقُوْلُوْا مَا جَآءَنَا مِنْۢ
بَشِيْرٍ وَّلَا نَذِيْرٍ ۫ فَقَدْ جَآءَكُمْ بَشِيْرٌ وَّنَذِيْرٌ ؕ وَاللّٰهُ
عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿١٩﴾

**अहो ग्रंथधारी लोकांनो! खचितच् आमचा पैगंबर तुमच्याजवळ, पैगंबरांच्या येण्याच्या एका कालावधीनंतर येऊन पोहचला आहे, जो तुमच्यासाठी स्पष्ट स्पष्ट वर्णन करीत आहे. यासाठी की, तुम्ही असे न म्हणावे की, आमच्या जवळ तर कोणी चांगले वाईट ऐकवणारा आलाच नाही. मग आता तर खचितच् खुषखबर ऐकवणारा आणि सावध करणारा, येऊन पोहचला[४] आणि अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे⑲**

وَاِذْ قَالَ مُوْسٰى لِقَوْمِهٖ يٰقَوْمِ اذْكُرُوْا نِعْمَةَ اللّٰهِ
عَلَيْكُمْ اِذْ جَعَلَ فِيْكُمْ اَنْۢبِيَآءَ وَجَعَلَكُمْ مُّلُوْكًا ۖۗ
وَّاٰتٰىكُمْ مَّا لَمْ يُؤْتِ اَحَدًا مِّنَ الْعٰلَمِيْنَ ﴿٢٠﴾

**आणि (जेव्हा) मूसा (अ.) ने आपल्या लोकांना सांगितले, हे माझ्या जाती बांधवांनो! अल्लाहतआलाच्या त्या उपकाराची आठवण करा, की त्याने, तुमच्यातून पैगंबर बनविले, आणि तुम्हाला बादशाह बनवून दिले[५], आणि तुम्हास ते दिले जे तमाम दुनियेत, कोणाला दिले नाही[६] ⑳**

يٰقَوْمِ ادْخُلُوا الْاَرْضَ الْمُقَدَّسَةَ الَّتِيْ كَتَبَ اللّٰهُ
لَكُمْ وَلَا تَرْتَدُّوْا عَلٰٓى اَدْبَارِكُمْ فَتَنْقَلِبُوْا خٰسِرِيْنَ ﴿٢١﴾

**हे माझ्या जाती बांधवांनो! या पवित्र भूमीत[७] दाखल होऊन जा, जी अल्लाहतआलाने तुमच्या नावे लिहून दिली आहे[८]; आणि (शत्रूच्या मुकाबल्यात) पाठ फिरवू नका; नाही[९] तर मग तोट्यात पडून जाल㉑**

قَالُوْا يٰمُوْسٰٓى اِنَّ فِيْهَا قَوْمًا جَبَّارِيْنَ ۖۗ وَاِنَّا لَنْ
نَّدْخُلَهَا حَتّٰى يَخْرُجُوْا مِنْهَا ۚ فَاِنْ يَّخْرُجُوْا مِنْهَا
فَاِنَّا دٰخِلُوْنَ ﴿٢٢﴾

**त्यांनी उत्तर दिले की, हे मूसा! तेथे तर बडे जबरदस्त लोक आहेत; आणि जोपर्यंत ते तेथून निघून जाणार नाहीत, आम्ही तर कधीच तेथे जाणार नाही. हाँ। जर ते लोक तेथून निघून जातील, तर मग आम्ही आनंदाने तेथे जाऊ[१०] ㉒**

१) यहूद्यांनी ह.उजैर عليه السلام आणि ख्रिस्त्यांनी ह.ईसा عليه السلام ला अल्लाहचा मुलगा म्हटले. आणि आपल्या स्वत:ला अल्लाहचे पुत्र आणि त्याचे लाडके ठरवून घेतले. काही म्हणतात की येथे एक शब्द 'महजुफ' आहे. ''आम्ही अल्लाहच्या पुत्राचे प्रिय आणि मसीहचे अनुयायी आहोत. दोन्ही अर्थामधून कोणताही अर्थ अभिप्रेत धरला तरी, यातून त्यांचा अहंकार आणि अल्लाहच्या बाबतीत गैरवाजबी भरोसा आढळून येतो. ज्याची अल्लाहजवळ काहीच किंमत नाही.

२) यात त्यांचा चर्चित अहंकार बीन बुडाचा असल्याचे स्पष्ट करून देण्यात आले आहे. की जर तुम्ही खरोखरच अल्लाहचे प्रिय आणि लाडके असतां, किंवा प्रिय होण्याचा अर्थ हा आहे की, तुम्ही जे इच्छाल ते कराल; अल्लाहतआला तुम्हाला विचारणा पण करणार नाही. तर मग अल्लाहतआला तुम्हास तुमच्या अपराधांच्या कारणाने शिक्षा का देत राहिला आहे? याचा सरळ अर्थ असा झाला की, अल्लाहच्या दरबारात निर्णय दाव्यांच्या आधारावर होत नाही, तसेच कयामतच्या दिवशीही होणार नाही; परंतु तो तर ईमान, सदाचरण आणि कर्म पाहतो; आणि जगांत देखील याच्या प्रकाशांत निर्णय करतो आणि कयामतच्या दिवशी पण याच तत्त्वावर निर्णय होईल.

३) तथापि हा शिक्षा किंवा माफीचा निर्णय त्याच अल्लाहच्या पद्धतीप्रमाणे होईल, ज्याचे त्याने स्पष्टीकरण करून दिले आहे की, ईमानवाल्यांसाठी माफी, आणि काफिर आणि आज्ञाभंजक लोकांसाठी शिक्षा. सर्व मनुष्यांचा निर्णय याचप्रमाणे होईल. अहो ग्रंथधारी लोकांनो! तुम्ही सुद्धा याची निर्माण केलेली निर्मिती म्हणजे मनुष्य आहात. तुमच्या

बाबतीत निर्णय दुसऱ्या मानव निर्मितीपेक्षा वेगळा का म्हणून व्हावा?
४) ह.ईसा ﷺ आणि ह.मुहम्मद ﷺ च्या मध्ये जवळ जवळ ५७० ते ६०० वर्षांचे अंतर आहे. ग्रंथधारी लोकांना सांगण्यात येत आहे की, या काळानंतर आम्ही आमचा शेवटचा पैगंबर ﷺ पाठवून दिला आहे; आता तुम्ही पण सांगू शकणार नाही की, आमच्याजवळ तर कोणी खुषखबरी देणारा आणि भिवविणारा पैगंबर आलाच नाही.
५) अधिकतर पैगंबर बनी इसराईल मधूनच झाले आहेत. ज्यांची क्रमवारी ह. ईसा ﷺ वर संपवून टाकण्यात आली. आणि शेवटचे पैगंबर बनु इस्माईल मधून झाले. (सल्लल्लाहु व अलैहि व सल्लम) याचप्रमाणे कित्येक बादशाहपण बनी इस्राईलमध्ये झाले. आणि काही पैगंबरांनापण अल्लाहतआलाने बादशाहत प्रदान केली. जसे ह सुलैमान ﷺ याचा अर्थ असा झाला की, पैगंबरीप्रमाणे बादशाहीपण अल्लाहचे बक्षीस आहे. त्याला विनाकारण वाईट समजणे, फार मोठी चूक आहे. जर बादशाहत वाईट गोष्ट असती तर अल्लाहतआला कोण्या पैगंबराला बादशाह न बनविता; तसेच त्याचा उल्लेख बक्षीस म्हणून केला नसता. जसे की आजकाल पश्चिमी लोकशाहीचा लेप, अशाप्रकारे आमच्या विचारांवर आच्छादला आहे आणि पश्चिमेच्या चालाख राजकारण्यांनी याची जादू अशाप्रकारे पसरविली आहे की, पश्चिमी विचारसरणीचे बंधक राजकारण्यावरच याची जादू चालत नाही, तर स्वत:ला मौलवी म्हणविणारे पण या विचारसरणीचे शिकार होऊन गेलेत. तथापि बादशाही किंवा वैयक्तिक सत्ता केंद्र, जर बादशाह आणि सत्ताधारी न्यायप्रिय आणि सदाचरणी असतील, तर लोकशाहीपेक्षा हजारपट उत्तम आहे. तपशिलासाठी पहावे लेखकाचे पुस्तक ''खिलापत व मुलूकियत की तारीखी व शरअी हैशियत''
६) हा इशारा आहे, त्या बक्षीस आणि चमत्काराकडे जे बनी इसराईलांना देण्यात आले. जसे मन्न व सल्वाचे उतरणे, ढगांची सावली, फिरऔन पासून सुटकेसाठी समुद्रात रस्ता बनवून देणे वगैरे. या अनुषंगाने हा समाज, आपल्या काळात श्रेष्ठत्व आणि उच्च स्थानी विराजमान होता. परंतु शेवटचे पैगंबर ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरी आणि आगमणामुळे आता हे श्रेष्ठत्वाचे स्थान 'उम्मते मुहम्मदीया' ला प्राप्त झाले आहे, ''तुम्ही उत्कृष्ट उम्मत आहात, जिला लोकांच्या फायद्यासाठी बनविण्यांत आले आहे,'' (सू. आले इमरान-११०) परंतु हे पण सशर्त आहे, त्या उद्देश पूर्तीसाठी जो या महावाक्यांत वर्णन करून देण्यांत आला आहे, ''तुम्ही लोकांना भलाईचा हुकूम देतात, वाईट कामापासून मना करतात, आणि अल्लाहवर ईमान ठेवतात.'' अल्लाहतआला 'उम्मते मुस्लिमा' ला या उद्देशाने काम करण्याची सुबुद्धी देवो! यासाठी की, त्यांनी आपल्या 'उत्कृष्ट उम्मत' होण्याचा अभिमान कायम ठेवावा.
७) बनु इस्राईलचे मोठे बुजुर्ग ह.याकूब ﷺ चे निवासाचे ठिकाण तर 'बैतुल' मुकद्दस' होते. परंतु ह.यूसुफ ﷺ च्या, इजिप्तच्या सरदारीच्या काळांत, हे लोक इजिप्तमध्ये जाऊंन बसले होते. मग तेव्हापासून त्या वेळपावेतो इजिप्त मध्येच राहिले, येथपावेतो की, ह.मूसा ﷺ त्यांना रातोरात (फिरऔन पासून लपवून) इजिप्त मधून काढून घेऊन गेले नाहीत. यावेळी बैतुल मुकद्दसवर 'अमालिका' ची राज्यसत्ता होती. जे एक शूर राष्ट्र होते. जेव्हा ह.मूसा ﷺ नी पुन्हा बैतुल मुकद्दसला जाऊन तेथे वसण्याचा प्रयत्न केला, तेव्हा यासाठी तेथे कब्जा असलेल्या अमालिकांशी 'जिहाद' आवश्यक होते. म्हणून ह.ईसा ﷺ नी आपल्या समाजाला या पवित्र भूमीत दाखल होण्याचा हुकूम दिला; आणि अल्लाहकडून मदत होण्याची खुषखबरपण दिली. परंतु यावर सुद्धा बनु इस्राईल अमालिका बरोबर युद्धाला तयार झाले नाहीत. (इब्ने कसीर)
८) याच्याने अभिप्रेतच तेच विजय आणि मदत आहे; ज्याचा वायदा अल्लाहतआलाने 'जिहाद' केल्यास, करून ठेवला होता.
९) म्हणजे 'जिहाद' पासून तोंड फिरवू नका.
१०) बनु इस्राईल, अमालिकाच्या शौर्याच्या प्रसिद्धीमुळे भिऊन गेले आणि पहिल्या वेळेसच हिंमत हारून बसले आणि जिहाद करण्यापासून हात काढून घेतला. अल्लाहचे रसूल ह. मूसा ﷺ च्या हुकूमाची काही पर्वा केली नाही; तसेच अल्लाहतआलाच्या मदतीच्या वायद्यावर विश्वास ठेवला नाही. आणि तेथे जाण्याला साफ नकार दिला.

قَالَ رَجُلَانِ مِنَ الَّذِينَ يَخَافُونَ أَنْعَمَ اللَّهُ عَلَيْهِمَا ادْخُلُوا عَلَيْهِمُ الْبَابَ فَإِذَا دَخَلْتُمُوهُ فَإِنَّكُمْ غَالِبُونَ وَعَلَى اللَّهِ فَتَوَكَّلُوا إِنْ كُنْتُمْ مُؤْمِنِينَ ﴿٢٣﴾

**दोन माणसांनी जे अल्लाहला भिणाऱ्या लोकांमधून होते, ज्यांच्यावर अल्लाहतआलाची कृपा होती, सांगितले की तुम्ही त्यांच्याजवळ दरवाज्यांत तर दाखल होऊन जा; दरवाज्यांत पाय ठेवताच, नक्कीच तुम्ही विजयी होऊन जाल. आणि जर तुम्ही मोमिन आहात, तर तुम्हास अल्लाहतआलावरच भरोसा ठेवला पाहिजे[१] ㉓**

قَالُوا يَا مُوسَىٰ إِنَّا لَنْ نَدْخُلَهَا أَبَدًا مَا دَامُوا فِيهَا فَاذْهَبْ أَنْتَ وَرَبُّكَ فَقَاتِلَا إِنَّا هَاهُنَا قَاعِدُونَ ﴿٢٤﴾

**(त्याच्या) लोकांनी सांगितले, की हे मूसा! जोपर्यंत ते तेथे आहेत, तोपर्यंत आम्ही मुळीच तेथे जाणार नाही; म्हणून तुम्ही आणि तुमचा पालनकर्ता दोन्हीच लढून घ्या, आम्ही येथेच बसलेलो आहोत[२] ㉔**

قَالَ رَبِّ إِنِّي لَا أَمْلِكُ إِلَّا نَفْسِي وَأَخِي فَافْرُقْ بَيْنَنَا وَبَيْنَ الْقَوْمِ الْفَاسِقِينَ ﴿٢٥﴾

**मूसा (अ.) म्हणू लागले, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्याशिवाय आणि माझ्या भावाशिवाय आणखी कोणावर माझा जोर चालत नाही. बस तू आमच्यांत आणि या आज्ञाभंजकात भेद करून[३] दे ㉕**

قَالَ فَإِنَّهَا مُحَرَّمَةٌ عَلَيْهِمْ أَرْبَعِينَ سَنَةً يَتِيهُونَ فِي الْأَرْضِ فَلَا تَأْسَ عَلَى الْقَوْمِ الْفَاسِقِينَ ﴿٢٦﴾

**(आम्ही) आज्ञाविले की, ही भूमी त्यांच्यावर चाळीस वर्षे पर्यंत वर्ज्य करून दिली गेली आहे. पृथ्वीत, ते रानोमाळ भटकत फिरतील[४]; म्हणून तुम्ही या आज्ञाभंजकाच्या बाबतीतउदास होऊ नये[५] ㉖**

१) ह.मूसा ﷵ च्या समाजातून फक्त ही दोन माणसे, खऱ्या अर्थाने ईमानदार निघाली. ज्यांना अल्लाहच्या मदतीवर भरोसा होता. त्यांनी समाजाला समजाविले की, तुम्ही हिंमत तर करा; मग पाहा; कशाप्रकारे अल्लाहतआला तुम्हाला वर्चस्व प्रदान करून देतो.

२) परंतु यावर सुद्धा बनी इस्राईलने अत्यंत वाईट, भित्रेपणा, उद्धटपणा, दाखवित सांगितले की, तू आणि तुझा पालनकर्ता जाऊन लढून घ्या. याच्या उलट जेव्हा बद्रच्या युद्धाच्या प्रसंगी रसूल ﷺ नी जेव्हा सहाबा कराम ﷺ शी सल्लामसलत केली, तर त्यांनी कमी संख्याबल आणि साधन सामुग्रीची कमतरता असून सुद्धा 'जिहाद' मध्ये भाग घेण्यासाठी भरपूर इच्छेचे प्रदर्शन केले आणि ते म्हणाले हे रसूलुल्लाह! ﷺ आम्ही आपणास अशाप्रकारे सांगणार नाही, ज्याप्रमाणे मूसा ﷵ च्या लोकांनी मूसा ﷵ ला सांगितले होते. (स.बुखारी किताबुल मगाजी वल तफसीर)

३) याच्यांत आज्ञाभंजक समाजाच्या तुलनेत आपल्या लाचारीचे प्रदर्शनपण आहे आणि त्यांच्यापासून अलिप्त होण्याचे जाहीर करणेपण आहे.

४) याला 'तिया' चे मैदान म्हणतात. ज्यात चाळीस वर्ष हा समाज, आपला आज्ञाभंग आणि जिहादपासून तोंड फिरविल्यामुळे भटकत राहिला. या मैदानांत, यावर सुद्धा, यांच्यावर 'मन्न व सलवा' उतरत राहिले. ज्याला कंटाळून, त्यांनी, पैगंबरांना सांगितले की, रोज रोज एकाच प्रकारचे जेवण करून, आमचे मन भरून गेले आहे. आपल्या पालनकर्त्यापाशी प्रार्थना कर, की तो वेगवेगळ्या प्रकारच्या भाज्या आणि डाळी आमच्याकरीता निर्माण करेल. येथेच त्याच्यावर ढगांची सावली झाली. दगडावर ह.मूसा ﷵ नी लाठी मारल्याने बारा घराण्यासाठी बारा झरे वाहू लागले; आणि अशाचप्रकारे दुसरी बक्षीसे मिळत राहिली. चाळीस वर्षानंतर मग अशी परिस्थिती निर्माण करण्यात आली की हे बैतुल मुकद्दसमध्ये प्रवेश करते झाले.

५) पैगंबर आवाहन आणि प्रचार करून सुद्धा जेव्हा पाहतो की, माझे जाती बांधव सरळमार्ग स्वीकारायला तयार नाहीत, ज्यात त्यांच्यासाठी धर्म आणि ऐहिक जगात चांगुलपणा आहे. तर नैसर्गिक रीत्या, त्याला फारच खेद आणि मानसिक दु:ख होते. अशीच नबी करीम ﷺ ची पण स्थिती होत असे. ज्याचे वर्णन कुरआन मजीद मध्ये, अल्लाहतआलाने अनेक ठिकाणी केले आहे. परंतु या महावाक्यांत ह.मूसा ﷵ ला संबोधित करून सांगण्यात येत आहे की, जेव्हा तू, प्रचाराचे कर्तव्य निभावून दिले; आणि अल्लाहचा संदेश लोकांपर्यंत पोहचवून दिला; आणि आपल्या समाजाला फार मोठ्या शानदार साफल्याच्या सुरवातीच्या टप्प्यावर आणून उभे केले. परंतु आता ते आपल्या कमी धाडसामुळे आणि वाईट विचारामुळे तुझी गोष्ट मानण्यांस तयार नाही. म्हणून तर तू आपल्या कर्तव्य पालनातून मुक्त होऊन गेलास; आणि आता तुला त्यांच्याबाबतीत दु:खी होण्याची आवश्यकता नाही. अशाप्रसंगी दु:ख होणे तर स्वाभाविक आहे. परंतु अभिप्रेत या सांत्वनाने हे आहे की, प्रचार आणि आवाहनानंतर आता तुम्ही अल्लाहच्याजवळ जबाबदारीतून मुक्त झाला आहात.

وَاتْلُ عَلَيْهِمْ نَبَاَ ابْنَيْ اٰدَمَ بِالْحَقِّ ۘ اِذْ قَرَّبَا قُرْبَانًا فَتُقُبِّلَ مِنْ اَحَدِهِمَا وَلَمْ يُتَقَبَّلْ مِنَ الْاٰخَرِ ؕ قَالَ لَاَقْتُلَنَّكَ ؕ قَالَ اِنَّمَا يَتَقَبَّلُ اللّٰهُ مِنَ الْمُتَّقِيْنَ ﴿٢٧﴾

**आणि आदम (अ.) च्या दोन्ही मुलांचा खराखरा वृत्तांत पण त्यांना ऐकवून द्या[१]; या दोघांनी एक भेट अर्पण केली. यांच्यातून एकाची भेट तर मान्य होऊन गेली; आणि दुसऱ्याची मान्य झाली नाही[२]. तर तो म्हणू लागला की मी तुला मारूनच टाकेन. त्याने सांगितले की, अल्लाहतआला ईशभय बाळगणाऱ्यांचेच कर्म मान्य करतो ㉗**

لَئِنْۢ بَسَطْتَّ اِلَيَّ يَدَكَ لِتَقْتُلَنِيْ مَاۤ اَنَا بِبَاسِطٍ يَّدِيَ اِلَيْكَ لِاَقْتُلَكَ ۚ اِنِّيْۤ اَخَافُ اللّٰهَ رَبَّ الْعٰلَمِيْنَ ﴿٢٨﴾

**जरी तू मला ठार करण्यासाठी आपले हात लाब करशील, परंतु मी तुला ठार करण्यासाठी हात मुळीच उचलणार नाही. मी तर अल्लाहतआला, साऱ्या जगाच्या पालनकर्त्याला भितो ㉘**

اِنِّيْۤ اُرِيْدُ اَنْ تَبُوْٓاَ بِاِثْمِيْ وَاِثْمِكَ فَتَكُوْنَ مِنْ اَصْحٰبِ النَّارِ ۚ وَذٰلِكَ جَزٰٓؤُا الظّٰلِمِيْنَ ﴿٢٩﴾

**मी तर हेच इच्छितो की, तू माझा अपराध आणि आपले अपराध आपल्या शिरावर घ्यावे[३]; आणि नरकाग्नीत जाणाऱ्यांमध्ये शामील होऊन जावे. जालीमांचा हाच मोबदला आहे ㉙**

فَطَوَّعَتْ لَهٗ نَفْسُهٗ قَتْلَ اَخِيْهِ فَقَتَلَهٗ فَاَصْبَحَ مِنَ الْخٰسِرِيْنَ ﴿٣٠﴾

**मग त्याला त्याच्या जिवाने, आपल्या भावाला ठार करण्याला उद्युक्त करून दिले; आणि त्याने त्याला ठार करून टाकले. ज्यामुळे तो नुकसान पावणाऱ्यांमध्ये होऊन गेला[४] ㉚**

१) ह.आदम عليه السلام च्या या दोन पुत्रांची नावे हाबील आणि काबील होती.

२) ही भेट किंवा कुरबानी कशासाठी दिली गेली? याच्या बाबतीत कोणी खरी रिवायत नाही. परंतु मशहुर हे आहे की, सुरवातीला ह.आदम عليه السلام आणि हव्वाच्या मिलनाने एकाचवेळी मुलगा आणि मुलगी जन्माला आले. दुसऱ्या गर्भातून पुन्हा मुलगा मुलगी झाल्यावर एका गर्भाच्या बहीण भावाचे लग्न दुसऱ्या गर्भाच्या बहीण भावाशी करून दिले जात असे. हाबीलच्या बरोबर जन्मलेली बहीण कुरूप होती. जेव्हा की, काबिलच्या बरोबर जन्मलेली बहीण सुंदर होती. त्या वेळच्या तत्त्वाप्रमाणे हाबीलचे लग्न काबीलच्या बहिणीबरोबर आणि काबीलचे लग्न हाबीलच्या बहीणी बरोबर होणार होते. परंतु काबिल इच्छित होता की, तो हाबिलच्या बहिणीच्या ऐवजी आपल्याच बहिणीबरोबर जी सुंदर होती, लग्न करावे. ह.आदम عليه السلام नी त्याला समजाविले, परंतु त्याने मानले नाही. सरतेशेवटी ह.आदम عليه السلام नी दोघांना अल्लाहच्या दरबारी कुरबानी करण्याचा आदेश दिला आणि सांगितले की, ज्याची कुरबानी मान्य होऊन जाईल, काबीलच्या बहिणीचे लग्न त्याच्या बरोबर करून दिले जाईल. हाबीलची कुरबानी मान्य होऊन गेली. म्हणजे आकाशातून अग्नी आला आणि तिला खावून गेला. जे याचे मान्य होण्याचा पुरावा होता. काही भाष्यकारांचा विचार आहे की, दोघा भावांनी तसेच आपआपल्या मनाप्रमाणे अल्लाहच्या समक्ष भेट अर्पण केली. हाबील ने एका चांगल्या एडक्याची कुरबानी आणि काबील ने एका गव्हाच्या ओंबीची. हाबीलची कुरबानी मान्य झाल्यावर काबील त्याचा द्वेष करू लागला.

३) माझ्या गुन्ह्याचा अर्थ, खुनाचा जो गुनाह आहे, तो मला त्यावेळेस झाला असतां, जेव्हा मी तुझा खून केला असता. जसे की हदीसमध्ये येते की, खुनी आणि ज्याचा खून झाला आहे तो दोन्ही नरकाग्नीत जातील. सहाबा कराम رضي الله عنهم नी विचारले, खुन्याचे जहन्नममध्ये जाणे तर लक्षांत येते, (पण) ज्याचा खून झाला आहे तो जहन्नममध्ये का जाईल? आपण ﷺ. नी फर्माविले, ''यासाठी की, तो पण आपल्या साथीदाराला ठार करण्याचा इच्छुक होता. (बुखारी व मुस्लीम किताबुल फितन)

४) म्हणून हदीसमध्ये येते, ''जो खून पण अत्याचाराने होत असतो (खुन्याच्या बरोबर) त्याच्या नाहक खुनाचे ओझे आदमच्या या पहिल्या मुलावर पण असते; कारण की ही पहिली व्यक्ती आहे, जिने खूनाचे काम केले.'' (सहीह बुखारी व सहीह मुस्लीम) इमाम इब्ने कसीर म्हणतात की, उघड गोष्ट ही ठाऊक होते की, काबीलला हाबीलच्या नाहक खुनाची शिक्षा जगातच तात्कालिक स्वरूपात देऊन देण्यात आली होती. हदीसमध्ये सुद्धा येते की नबी ﷺ नी फर्माविले, जुलूम आणि अत्याचार आणि नाते संबंध तोडणे हे दोन्ही अपराध, या गोष्टीला जास्त लायक आहेत, की अल्लाहतआलाने त्याच्या करणाऱ्यांना या जगातच लवकर शिक्षा देऊन द्यावी. तथापि परलोकांतील शिक्षा, याचे शिवाय त्यांच्यासाठी शिल्लक राहील; जी त्यांना तेथे भोगावी लागेल.'' (अबुदाऊद , इब्ने माजा आणि मुसनद अहमद) आणि काबीलमध्ये हे दोन्ही अपराध जमा झाले होते. ''फइन्नलिल्लाहे व इन्ना इलैही राजेऊन!'' (इब्ने कसीर)

فَبَعَثَ اللّٰهُ غُرَابًا يَّبۡحَثُ فِى الۡاَرۡضِ لِيُرِيَهٗ كَيۡفَ يُوَارِىۡ سَوۡءَةَ اَخِيۡهِ‌ ؕ قَالَ يٰوَيۡلَتٰٓى اَعَجَزۡتُ اَنۡ اَكُوۡنَ مِثۡلَ هٰذَا الۡغُرَابِ فَاُوَارِىَ سَوۡءَةَ اَخِىۡ‌ ۚ فَاَصۡبَحَ مِنَ النّٰدِمِيۡنَ ﴿۳۱﴾

मग अल्लाहतआलाने एका कावळ्याला पाठविले; जो जमीन खोदत होता; कारण की त्याला दाखवावे की, त्याने कशा प्रकारे आपल्या भावाच्या प्रेताला लपवावे. तो म्हणू लागला, अरेरे किती खेद आहे! काय मी असे करण्यापासून पण वंचित राहिलो; की या कावळ्याप्रमाणे आपल्या भावाच्या प्रेताला दफन करून दिले असते? मग तर तो (मोठाच) पश्चात्ताप दग्ध आणि लज्जीत झाला ३१

مِنۡ اَجۡلِ ذٰلِكَ ‌ۛ ۚ كَتَبۡنَا عَلٰى بَنِىۡۤ اِسۡرَآءِيۡلَ اَنَّهٗ مَنۡ قَتَلَ نَفۡسًۢا بِغَيۡرِ نَفۡسٍ اَوۡ فَسَادٍ فِى الۡاَرۡضِ فَكَاَنَّمَا قَتَلَ النَّاسَ جَمِيۡعًا ؕ وَمَنۡ اَحۡيَاهَا فَكَاَنَّمَاۤ اَحۡيَا النَّاسَ جَمِيۡعًا‌ ؕ وَلَقَدۡ جَآءَتۡهُمۡ رُسُلُنَا بِالۡبَيِّنٰتِ ثُمَّ اِنَّ كَثِيۡرًا مِّنۡهُمۡ بَعۡدَ ذٰلِكَ فِى الۡاَرۡضِ لَمُسۡرِفُوۡنَ ﴿۳۲﴾

याच कारणाने आम्ही, बनी इस्राईलवर हे लिहून टाकले की, जो मनुष्य कोणाला, याच्याशिवाय की तो कुणाचा खुनी असावा, किंवा मुलखात फसाद करणारा असावा, मारून टाकेल; तर जणू त्याने सर्व लोकांना मारून टाकले; आणि जो मनुष्य कोण्या एकाचा जीव वाचवेल, त्याने जणू सर्व लोकांना जिवंत करून टाकले[१]; आणि त्यांच्याजवळ आमचे बरेचसे पैगंबर स्पष्ट निशाण्या घेऊन आले होते. परंतु तरीसुद्धा याच्यानंतर, यांच्यातील बहुतेक लोक जमिनीवर जुलूम आणि अत्याचार आणि जबरदस्ती करणारेच राहिले[२] ३२

اِنَّمَا جَزٰٓؤُا الَّذِيۡنَ يُحَارِبُوۡنَ اللّٰهَ وَرَسُوۡلَهٗ وَيَسۡعَوۡنَ فِى الۡاَرۡضِ فَسَادًا اَنۡ يُّقَتَّلُوۡۤا اَوۡ يُصَلَّبُوۡۤا اَوۡ تُقَطَّعَ اَيۡدِيۡهِمۡ وَاَرۡجُلُهُمۡ مِّنۡ خِلَافٍ اَوۡ يُنۡفَوۡا مِنَ الۡاَرۡضِ‌ ؕ ذٰلِكَ لَهُمۡ خِزۡىٌ فِى الدُّنۡيَا‌ وَلَهُمۡ فِى الۡاٰخِرَةِ عَذَابٌ عَظِيۡمٌ ۙ‏ ﴿۳۳﴾

याची शिक्षा जे अल्लाहतआलाशी आणि त्याच्या पैगंबराशी लढतील; आणि जमिनीवर उपद्रव करीत फिरतील;हीच आहे की, त्यांना ठार करून टाकले जावे, किंवा सुळी दिले जावे, किंवा विरूद्ध दिशेने त्यांचे हातपाय कापून टाकले जावेत, किंवा त्यांना हद्दपार करून टाकले जावे[३]; ही तर झाली त्यांची या जगांतली अप्रतिष्ठा आणि फजिती, आणि परलोकांत त्यांच्यासाठी फार मोठी शिक्षा आहे ३३

اِلَّا الَّذِيۡنَ تَابُوۡا مِنۡ قَبۡلِ اَنۡ تَقۡدِرُوۡا عَلَيۡهِمۡ‌ ۚ فَاعۡلَمُوۡۤا اَنَّ اللّٰهَ غَفُوۡرٌ رَّحِيۡمٌ ﴿۳۴﴾

ع ٥ ٨ ٩ | ५ ८ ९

हां! जे लोक याच्यापूर्वी तौबा करून घेतील; की तुम्ही त्यांच्यावर वर्चस्व पावाल[४]; तर विश्वास ठेवा की, अल्लाहतआला मोठाच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ३४

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوا اتَّقُوا اللّٰهَ وَابۡتَغُوۡۤا اِلَيۡهِ الۡوَسِيۡلَةَ وَجَاهِدُوۡا فِىۡ سَبِيۡلِهٖ لَعَلَّكُمۡ تُفۡلِحُوۡنَ ﴿۳۵﴾

हे मुसलमानांनो! अल्लाहतआलाला भित रहा. आणि त्याचे सानिध्य प्राप्त करण्याची पराकाष्टा करा[५]; आणि त्याच्या मार्गांत जिहाद करा. जेकी तुम्ही सफल होवो! ३५

१) या नाहक खुनानंतर अल्लाहतआलाने माणसाच्या जिवाची कद्र आणि किंमत स्पष्ट करण्यासाठी बनु इस्राईलवर हा हुकूम अवतरीत केला. याच्याने अंदाज केला जाऊ शकतो की, अल्लाहतआलाजवळ माणसाच्या रक्ताचे किती महत्त्व आणि सन्मान आहे. आणि हे तत्त्व फक्त बनी इस्राईल करीताच नव्हते. इस्लामच्या शिक्षणाच्या दृष्टीने, हे तत्त्व नेहमीसाठी आहे. सुलैमान बिन अली रिबई म्हणतात, की मी ह.हसन बसरीला विचारले, ''हे महावाक्य आमच्यासाठी पण आहे, ज्याप्रमाणे बनी इस्राईलसाठी होते.'' त्यांनी सांगितले, ''हां! शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची, ज्याच्यावाचून अन्य कोणी उपास्य नाही. बनु इस्राईलचे रक्त अल्लाहजवळ, आमच्या रक्तापेक्षा जास्त सन्माननीय नव्हते.'' (तफसीर इब्ने कसीर)

२) याच्यात यहूद्यांना दटावणी आहे की, त्यांचेजवळ पैगंबर निशाण्या आणि पुरावे घेऊन येत राहिले, परंतु त्यांची वागणूक नेहमी मर्यादेच्या बाहेर जाण्याचीच राहिली. याच्यांत जणूं नबी ﷺ चे सांत्वन केले जात आहे की, हे आपणाला ठार करण्याचे आणि नुकसान पोहोचविण्याची जी कारस्थाने करीत आहेत; ही काही नवीन गोष्ट नाही. यांचा सर्व इतिहासच चालबाजी आणि धोका देण्याने भरला आहे. आपण प्रत्येक स्थितीत अल्लाहवर भरोसा ठेवावा, जो चांगली चाल खेळणारा आहे. सर्व कारस्थानांपेक्षा चांगली युक्ती करणारा आहे.

३) याच्या अवतरण्याच्या कारणांत येते, की अुकुल आणि उरैना घराण्याचे काही लोक मुसलमान होऊन मदीनेला आले. त्यांना मदीनेचे हवामान मानवले नाही. तेव्हा नबी ﷺ नी त्यांना, मदीनेच्या बाहेर जेथे सदक्याचे उंट होते,

पाठवून दिले की, त्यांचे दूध आणि मुत्र प्या. अल्लाह तुम्हाला तंदुरूस्ती देईल मग थोड्याच दिवसात ते चांगले होऊन गेले. परंतु याच्यानंतर त्यांनी उंटाच्या राखणदारांना आणि चारणाऱ्यांना ठार करून टाकले; आणि उंटांना हाकलून घेऊन गेले. जेव्हा नबी ﷺ ला या घटनेची सूचना मिळाली तेव्हा आपण ﷺ नी त्यांच्या मागे काही लोकांना पळविले; ज्यांनी त्यांना उंटासमवेत पकडून आणले. नबी ﷺ नी त्यांचे हातपाय विरूद्ध दिशेत कापून टाकले. यांच्या डोळ्यात गरम सळ्या फिरविल्या. (कारण की त्यांनीही गुराख्यांबरोबर असेच केले होते) मग त्यांना उन्हात टाकून देण्यांत आले येथपावेतो की, तेथेच ते मरण पावले. सही बुखारीमध्ये हे शब्दपण आलेले आहेत की, त्यांनी चोरीपण केली, खूनपण केला, ईमान आणल्यानंतर 'कुफ्र' पण केले. आणि अल्लाहचे रसूल ﷺ बरोबर लढाई पण केली. (स.बुखारी , स.मुस्लीम) हे महावाक्य 'आयाते मुहारबा' म्हणविली जाते. इचा हुकूम सार्वत्रिक आहे; म्हणजे मुसलमान आणि काफिर दोहोंना शामील करते. 'मुहारबा' चा अर्थ आहे, कोण्या सुसंगठीत आणि हल्लेखोर समूहाचा इस्लामी राज्याच्या हद्दीत किंवा त्याच्या जवळ जंगलात वगैरे मध्ये रस्त्याने चालणाऱ्या काफल्यांवर, माणसावर आणि समूहांवर हल्ला करणे, खून आणि गारदगिरी करणे, लुटमार करणे, पळवून नेणे आणि इज्जत घेणे वगैरे. याच्या ज्या चार शिक्षा वर्णन करण्यांत आल्या आहेत, इमाम (त्या वेळेचा खलीफा) ला अधिकार आहे की, यातून जी शिक्षा योग्य समजेल ती द्यावी. काही लोक म्हणतात की, जर गुंडागर्दी करणाऱ्यांनी खून आणि लुटमार केली, आणि आतंकवाद केला, तर त्यांना ठार मारणे आणि सुळी देण्याची शिक्षा दिली जाईल. आणि ज्याने फक्त खून केला, माल घेतला नाही त्याला ठार करण्यात येईल आणि ज्याने खून केला आणि माल पण हिसकावून घेतला, त्याचा एक उजवा हात आणि डावा पाय किंवा डावा हाथ आणि उजवा पाय कापून टाकण्यांत येईल. आणि ज्याने खून पण केला नाही आणि माल पण घेतला नाही फक्त दहशत (आतंक) बसविली, त्याला हद्दपार करून देण्यात येईल. परंतु इमाम शौकानी म्हणतात, पहिली गोष्ट खरी आहे की, शिक्षा देण्यात इमामला अधिकार आहे (फत्हुल कदीर)

४) म्हणजे अटक होण्यापूर्वी जर ते तौबा करून इस्लामी अधिसत्तेच्या आज्ञापालनाला जाहीर करून देतील, तर मग त्यांना माफ करून टाकण्यात येईल. चर्चित शिक्षा दिल्या जाणार नाहीत. परंतु मग या हुकूमात मतभेद आहे की, शिक्षेच्या माफी बरोबर खून करून किंवा माल लुटून किंवा इज्जत लुटून सेवकांवर जो जुलूम केला, हे अपराध पण माफ होऊन जातील, किंवा त्याचा बदला घेतला जाईल. काही धर्म पंडितांजवळ हे माफ होणार नाही; किंबहुना त्यांचा बदला किंवा 'किसास' घेतला जाईल. इमाम शौकानी आणि इमाम इब्ने कसीर यांचा कल याकडे आहे, की एकदमच माफ करून टाकले जाईल. आणि यालाच उघड महावाक्याचा उद्देश दाखविण्यात आला आहे. तथापि अटक केल्यानंतर तौबाने अपराध क्षमा केले जाणार नाहीत. ते शिक्षेलाच पात्र ठरतील. (फत्हुल कदीर आणि इब्ने कसीर)

५) 'वसीला' चा अर्थ अशा गोष्टीचा आहे, जो कोण्या उद्देशाच्या प्राप्तीसाठी किंवा त्याच्या जवळीकतेचे साधन असावे. ''अल्लाहतआलाकडे वसीला शोधा'' चा अर्थ होईल, अशी कर्मे अंगिकार करा, ज्यामुळे तुम्हाला अल्लाहची सुप्रसन्नता आणि त्याचे सानिध्य प्राप्त होऊन जावे. इमाम शौकानी म्हणतात, ''वसीला जो सानिध्याच्या अर्थात आहे, ईशभय आणि चांगल्या सवयींवर आधारित आहे. ज्याच्यामुळे सेवक आपल्या पालनकर्त्याचे सानिध्य प्राप्त करतात.'' अशाप्रकारे मना केलेली कामे आणि निषीद्ध कामे, यापासून बचाव केल्यास अल्लाहचे सानिध्य प्राप्त होते, म्हणून मना केलेली कामे आणि निषीद्ध कामे न केल्यास अल्लाहच्या सानिध्याचा 'वसीला' आहे. परंतु अडाणी लोकांनी या खऱ्या वसील्याला सोडून थडग्यात दफन झालेल्या लोकांना आपला 'वसीला' समजून घेतला आहे. ज्याला धर्मशास्त्रात काही आधार नाही. तथापि हदीसमध्ये, त्या 'मकामे महमूदला' पण 'वसीला' म्हणण्यात आले आहे; जे स्वर्गात नबी ﷺ ला देण्यात येणार आहे. याचसाठी आपण ﷺ नी फर्माविले; जो अजाननंतर माझ्याकरीता 'वसीला' ची दुआ करेल तो माझ्या शिफारसचा हकदार होईल. (स.बुखारी किताबुल अजान, स.मुस्लीम किताबुस् सलात)

**दुआ-ए -वसीला** जी अजान नंतर पढणे सुन्नत आहे.

''अल्लाहुम्मा रब्बा हाजेहिद् दअवतित तआम्मते वस्सलतील काईमते आति मुहम्मदनिल् वसीलता वल् फज़ीलता वबअसहु मकामम् महमुदा निल् लज़ी वअद्त्तहु.'' (स. बुखारी, स. मुस्लीम)

إِنَّ الَّذِينَ كَفَرُوا لَوْ أَنَّ لَهُم مَّا فِي الْأَرْضِ
جَمِيعًا وَمِثْلَهُ مَعَهُ لِيَفْتَدُوا بِهِ مِنْ عَذَابِ يَوْمِ
الْقِيَامَةِ مَا تُقُبِّلَ مِنْهُمْ ۖ وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿٣٦﴾

**विश्वास ठेवा की, काफिरांकरीता जर ते सर्व काही असो जे जमिनीत आहे, आणि त्याच्याबरोबरच तितकेच आणखी पण असेल, आणि ते या सर्वांस कयामतीच्या दिवशी शिक्षेच्या बदल्यात देऊ इच्छितील, तरी पण अशक्य आहे की, त्यांचे प्राणमूल्य कबूल करून घेतले जावे; त्यांच्यासाठी तर यातनादायक शिक्षाच आहे[१] ३६**

يُرِيدُونَ أَن يَخْرُجُوا مِنَ النَّارِ وَمَا هُم بِخَارِجِينَ
مِنْهَا ۖ وَلَهُمْ عَذَابٌ مُّقِيمٌ ﴿٣٧﴾

**हे इच्छितील की, नरकाग्नीतून निघून जावे, परंतु ते कधीच तिच्यातून निघूंशकणार नाहीत. त्यांच्यासाठी तर नित्याची शिक्षा आहे[२] ३७**

وَالسَّارِقُ وَالسَّارِقَةُ فَاقْطَعُوا أَيْدِيَهُمَا جَزَاءً بِمَا
كَسَبَا نَكَالًا مِّنَ اللَّهِ ۗ وَاللَّهُ عَزِيزٌ حَكِيمٌ ﴿٣٨﴾

**चोरी करणाऱ्या पुरुष आणि स्त्रियांचे हात कापून देत जा[३]. हा बदला आहे, त्याचा जे त्यांनी केले; ही शिक्षा आहे अल्लाहकडून आणि अल्लाहतआला सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे ३८**

فَمَن تَابَ مِن بَعْدِ ظُلْمِهِ وَأَصْلَحَ فَإِنَّ اللَّهَ
يَتُوبُ عَلَيْهِ ۗ إِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿٣٩﴾

**जो मनुष्य आपल्या गुन्ह्यांनंतर तौबा करून घेईल आणि (आपल्यात) सुधारणा करून घेईल; तेव्हा अल्लाहतआला दयेसह त्याच्याकडे वळतो[४]; खचितच् अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ३९**

أَلَمْ تَعْلَمْ أَنَّ اللَّهَ لَهُ مُلْكُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ ۗ
يُعَذِّبُ مَن يَشَاءُ وَيَغْفِرُ لِمَن يَشَاءُ ۗ وَاللَّهُ عَلَىٰ
كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٤٠﴾

**काय तुला ठाऊक नाही की, आकाश आणि पृथ्वीचे राज्य अल्लाहसाठीच आहे? ज्याला इच्छिल त्याला शिक्षा देईल, आणि ज्याला इच्छिल त्याला क्षमा करून टाकेल. अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे ४०**

يَا أَيُّهَا الرَّسُولُ لَا يَحْزُنكَ الَّذِينَ يُسَارِعُونَ فِي
الْكُفْرِ مِنَ الَّذِينَ قَالُوا آمَنَّا بِأَفْوَاهِهِمْ وَلَمْ تُؤْمِن
قُلُوبُهُمْ ۛ وَمِنَ الَّذِينَ هَادُوا ۛ سَمَّاعُونَ
لِلْكَذِبِ سَمَّاعُونَ لِقَوْمٍ آخَرِينَ لَمْ يَأْتُوكَ ۖ
يُحَرِّفُونَ الْكَلِمَ مِن بَعْدِ مَوَاضِعِهِ ۖ يَقُولُونَ
إِنْ أُوتِيتُمْ هَٰذَا فَخُذُوهُ وَإِن لَّمْ تُؤْتَوْهُ
فَاحْذَرُوا ۚ وَمَن يُرِدِ اللَّهُ فِتْنَتَهُ فَلَن تَمْلِكَ
لَهُ مِنَ اللَّهِ شَيْئًا ۚ أُولَٰئِكَ الَّذِينَ لَمْ يُرِدِ
اللَّهُ أَن يُطَهِّرَ قُلُوبَهُمْ ۚ لَهُمْ فِي الدُّنْيَا خِزْيٌ ۖ
وَلَهُمْ فِي الْآخِرَةِ عَذَابٌ عَظِيمٌ ﴿٤١﴾

**हे पैगंबरा! आपण या लोकांसाठी कुढापा करू नये, जे 'कुफ्र' मध्ये पुढेच चालले जात आहेत. मग जरी ते (दांभिकातून असोत), जे तोंडाने तर ईमानाचा दावा करतात, आणि वास्तवेत त्यांची अंत:करणे, ईमानाने युक्त नाहीत[५] आणि यहूद्यांतून काही लोक असे आहेत, ज्यांना खोट्या गोष्टी ऐकण्याची सवय आहे आणि या लोकांचे हेर आहेत, जे आतापर्यंत तुमच्याजवळ आले नाहीत.ते शब्दांस त्यांच्या जागेवरून फिरवा फिरव करतात. (आणि लोकांस) सांगतात की, जर तुम्हास हाच हुकूम दिला जाईल, तर मान्य करून घ्या. आणि जर हा हुकूम मिळाला नाही तर त्यापासून जपून[६] रहा. आणि ज्याचे वाईट करणे अल्लाहला मंजूर असेल; तर आपण त्याच्या करीता, अल्लाहच्या मार्गदर्शनांत काहीच गोष्टीचा अधिकार बाळगत नाही. अल्लाहतआलाचा विचार त्यांच्या अंत:करणांना शुद्ध करण्याचा नाही. त्यांच्यासाठी या जगांत सुद्धा मोठी अप्रतिष्ठा आणि फजिती आहे आणि परलोकांत सुद्धा त्यांच्यासाठी मोठी कडक शिक्षा आहे ४१**

१) हदीसमध्ये येते की, एका नरकाग्नीत गेलेल्या माणसाला नर्कातून काढून अल्लाहसमोर उभे करण्यात येईल, अल्लाहतआला त्याला विचारेन, ''तू आपले विश्रांती स्थळ कसे पावलास?' तो म्हणेन अत्यंत 'वाईट विश्रांती स्थळ' अल्लाहतआला फर्मावील की, ''काय तू पृथ्वीच्या बरोबर सोने प्राणमूल्य देऊन त्यापासून सुटका करून घेणे पसंत करशील?'' तो होकारार्थी उत्तर देईन यावर अल्लाहतआला म्हणेन की, ''मी तर जगांत यापेक्षा ही फारच कमीची मागणी तुझ्याकडे केली होती; तू तेथे त्याची पर्वा केली नाहीत.'' मग त्याला पुन्हा दुसऱ्यांदा नरकाग्नीत टाकून दिले जाईल. (स.मुस्लीम , स.बुखारी )

२) हे महावाक्य काफिरांच्या बाबतीत आहे, कारण की, ईमानवाल्यांना सरतेशेवटी शिक्षेनंतर नरकाग्नीतून काढून

घेण्यात येईल. जसे की हदीसींनी सिद्ध आहे.
३) काही फुकहा ए ज़ाहीरी (धर्मशास्त्री) जवळ हात कापण्याचा हुकूम सर्व साधारण आहे; चोरी थोड्याशा वस्तूंची असो किंवा जास्तीची. अशाचप्रकारे ती सुरक्षित जागी ठेवली असो किंवा असुरक्षित जागी. प्रत्येक स्वरूपांत चोरीची शिक्षा दिली जाईल. दुसरे धर्मशास्त्री याच्याकरतां सुरक्षित स्थान आणि प्रमाणाला आवश्यक ठरवतात. मग प्रमाणाबाबत त्यांच्यात मतभेद आहेत. मोहद्देसीनजवळ चार दिनार किंवा तीन दिर्हम (किंवा त्या किंमतीची वस्तू) आहे. यापेक्षा कमी चोरीवर हात कापला जाणार नाही. तसेच हात मनगटापर्यंत कापले जातील. कोपरा किंवा खांद्यापासून नाही; जसा की काहींचा विचार आहे (तपशिलाकरीता हदीस व फिकाची पुस्तके आणि भाष्यांचा अभ्यास केला जावा.)
४) या तौबाने अभिप्रेत अल्लाहजवळ मान्य तौबा आहे. असे नाही की, तौबा केल्याने, चोरी किंवा कुणी असा अपराध ज्यावर इस्लामी धर्मशास्त्राने शिक्षा सांगितली आहे, ती माफ होऊन जाईल. अशा शिक्षा तौबाने माफ होणार नाहीत.
५) नबी करीम ﷺ ला कुफ्र आणि शिर्कवाल्यांकडून ईमान न आणणे आणि हिदायतचा मार्ग न स्वीकारल्याने जी खंत आणि खेद वाटत होता; यावर अल्लाहतआला आपल्या पैगंबराला जास्त दु:ख न करण्याचे मार्गदर्शन करीत आहे. कारण की या अनुषंगाने आपले सांत्वन व्हावे. की अशा लोकांच्या बाबतीत अल्लाहकडून माझी विचारपूस होणार नाही.
६) आयत नं.४१ ते ४४ च्या अवतरणांत दोन घटना वर्णन करण्यांत येतात. एक तर दोन विवाहित यहूदी व्याभिचारी (पुरूष आणि स्त्री) ची घटना. त्यांनी आपले पुस्तक तौरातमध्ये तर फेरफार केला होता; याशिवाय याच्या कित्येक गोष्टींवर अंमलबजावणीपण करीत नसत. त्यातूनच एक हुकूम धोंडमाराचा पण होता. जो त्यांच्या पुस्तकांत विवाहितांसाठी होता; आणि आतांसुद्धा आहे. परंतु ते या शिक्षेपासून वाचू इच्छित होते, म्हणून आपसात निर्णय केला की, ह.मुहम्मद ﷺ जवळ चला, जर आम्ही तयार केलेल्या पद्धतीप्रमाणे, कोडे मारणे,आणि तोंड काळे करण्याची शिक्षा देण्याचा निर्णय घेतला, तर आम्ही मानून घेऊ; आणि धोंडमाराचा निर्णय दिला, तर मानणार नाही. त्याप्रमाणे ह.अब्दुल्लाह बिन उमर رضي الله عنه म्हणतात की, यहूदी नबी करीम ﷺ च्या सेवेत हजर झाले. आपण ﷺ नी त्यांना विचारले की तौरात मध्ये धोंडमाराच्या शिक्षेबाबत काय आहे ? त्यांनी सांगितले की, तौरातमध्ये व्याभिचाराची शिक्षा कोडे मारणे, आणि अपमानीत करणे आहे. अब्दुल्लाह बिन सलाम ने सांगितले, तुम्ही खोटे बोलत आहांत. तौरातमध्ये धोंडमाराचा हुकूम उपस्थित आहे. जा, तौरात आणा. तौरात आणून ते वाचू लागले, तेव्हा धोंडमाराच्या महावाक्यावर हात ठेवून पुढील आणि मागील महावाक्ये वाचून दाखविली. अब्दुल्लाह बिन सलाम ने सांगितले हात उचला, हात उचलला तर तेथे धोंडमाराचे महावाक्य होते. सरतेशेवटी त्यांना मान्य करावे लागले की, ह.मुहम्मद ﷺ सत्य सांगत आहेत. तौरातमध्ये धोंडमाराचे महावाक्य उपस्थित आहे. म्हणून दोघा व्याभिचारींना धोंडमार करून टाकण्यात आले. (कृपया पहावे सहीऐन आणि दुसरी हदीसची पुस्तके) एक दुसरी घटना अशाचप्रकारे वर्णन करण्यांत येते की, यहूद्यांचे एक घराणे, आपल्या स्वत:ला दुसऱ्या यहूदी घराण्यांपेक्षा जास्त प्रतिष्ठीत आणि सन्माननीय समजत असे. आणि याचप्रमाणे आपल्या ठार झालेल्याचे प्राणमूल्य १०० वसक आणि दुसऱ्या घराण्यांच्या ठार झालेल्यांचे प्राणमूल्य ५० वसक निश्चित करून ठेवले होते. जेव्हा नबी ﷺ मदीनेत आले तेव्हा यहूद्यांच्या दुसऱ्या कबिल्यांना काही धाडस प्राप्त झाले, ज्यांच्या ठार झालेल्यांचे प्राणमूल्य अर्धे होते. आणि त्यांनी प्राणमूल्य १०० वसक देण्याला नकार दिला. शक्यता होती की, त्यांच्यांत या समस्येवर युद्ध सुरू झाले असते. परंतु त्यांचे समझदार लोक नबी ﷺ कडून निर्णय करून घेण्यावर राजी होऊन गेले. ह्या प्रसंगी हे महावाक्य अवतरीत झाले. ज्यांच्यातून एका महावाक्यात,''किसास' मध्ये समानतेचा हुकूम देण्यांत आला आहे. (ही रिवायत मुसनद अहमद मध्ये आहे. जिच्या सनदीला, शेख अहमद शाकीर नी बरोबर म्हटले आहे. मुसनद अहमद) इमाम इब्ने कसीर म्हणतात, शक्यता आहे दोन्ही कारणे एकाचवेळी जमा झाली असावीत. आणि या सर्वांसाठी या महावाक्यांचे अवतरण झाले असावे. (इब्ने कसीर)

سَمّٰعُونَ لِلْكَذِبِ اَكّٰلُونَ لِلسُّحْتِ ؕ فَاِنْ جَآءُوكَ فَاحْكُمْ بَيْنَهُمْ اَوْ اَعْرِضْ عَنْهُمْ ۚ وَاِنْ تُعْرِضْ عَنْهُمْ فَلَنْ يَّضُرُّوكَ شَيْـًٔا ؕ وَاِنْ حَكَمْتَ فَاحْكُمْ بَيْنَهُمْ بِالْقِسْطِ ؕ اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الْمُقْسِطِينَ ﴿٤٢﴾

हे कान लावून लावून, खोट्याचे ऐकणारे[१], आणि पोट भरभरून हरामचे खाणारे आहेत. जर हे तुमच्याजवळ आले, तर तुम्हाला अधिकार आहे, की तुम्ही त्यांच्या आपसातील न्यायनिवाडा करा, किंवा त्यांना टाळून द्या. जर तुम्ही त्यांच्याकडून तोंड जरी फिरवून घेतले, तरी सुद्धा हे तुम्हाला काहीही नुकसान पोहचवू शकत नाही. आणि जर तुम्ही त्यांच्यात न्यायनिवाडा कराल, तर त्यांच्यात न्यायाने न्यायनिवाडा करा. खचितच् न्याय करणाऱ्यांवर अल्लाह प्रीती ठेवतो ४२

وَكَيْفَ يُحَكِّمُونَكَ وَعِنْدَهُمُ التَّوْرٰىةُ فِيهَا حُكْمُ اللّٰهِ ثُمَّ يَتَوَلَّوْنَ مِنْ بَعْدِ ذٰلِكَ ؕ وَمَآ اُولٰٓئِكَ بِالْمُؤْمِنِينَ ﴿٤٣﴾ ع

(आश्चर्याची गोष्ट आहे की) ते आपल्याजवळ तौरात असून सुद्धा, ज्यात अल्लाहचे आदेश आहेत, तुम्हाला हाकिम (न्यायाधीश) बनवतात; मग त्यानंतरही फिरून जातात; वास्तविक हे ईमान आणि भरोसेवाले नाहीच ४३

(ع ६ ९ १०)

اِنَّآ اَنْزَلْنَا التَّوْرٰىةَ فِيهَا هُدًى وَّنُورٌ ۚ يَحْكُمُ بِهَا النَّبِيُّونَ الَّذِينَ اَسْلَمُوا لِلَّذِينَ هَادُوا وَالرَّبّٰنِيُّونَ وَالْاَحْبَارُ بِمَا اسْتُحْفِظُوا مِنْ كِتٰبِ اللّٰهِ وَكَانُوا عَلَيْهِ شُهَدَآءَ ۚ فَلَا تَخْشَوُا النَّاسَ وَاخْشَوْنِ وَلَا تَشْتَرُوا بِاٰيٰتِي ثَمَنًا قَلِيلًا ؕ وَمَنْ لَّمْ يَحْكُمْ بِمَآ اَنْزَلَ اللّٰهُ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْكٰفِرُونَ ﴿٤٤﴾

आम्ही तौरात अवतरीत केले आहे, ज्यात मार्गदर्शन आणि प्रकाश आहे. यहूद्यांमध्ये[२] याच तौरातच्या बरोबर, अल्लाहतआलाला मानणारे पैगंबर (अ.) आणि[३] अल्लाहवाले आणि धर्मपंडित फैसला करीत असत;कारण की त्यांना अल्लाहच्या या पुस्तकाच्या संरक्षणाचा हुकूम दिला गेला होता[४]; आणि ते यावर साक्षीदार होते[५]. आता तुम्हांस पाहिजे की, लोकांना भिऊ नका आणि फक्त माझेच भय बाळगा, माझ्या महावाक्यांना अत्यल्प किंमतीला विकू नका[६]. जे लोक अल्लाहने अवतरीत केलेल्या वह्यप्रमाणे निर्णय करणार नाहीत, ते पूर्ण आणि पक्के काफिर आहेत[७] ४४

وَكَتَبْنَا عَلَيْهِمْ فِيهَآ اَنَّ النَّفْسَ بِالنَّفْسِ ۙ وَالْعَيْنَ بِالْعَيْنِ وَالْاَنْفَ بِالْاَنْفِ وَالْاُذُنَ بِالْاُذُنِ وَالسِّنَّ بِالسِّنِّ ۙ وَالْجُرُوحَ قِصَاصٌ ؕ فَمَنْ تَصَدَّقَ بِهٖ فَهُوَ كَفَّارَةٌ لَّهٗ ؕ وَمَنْ لَّمْ يَحْكُمْ بِمَآ اَنْزَلَ اللّٰهُ فَاُولٰٓئِكَ هُمُ الظّٰلِمُونَ ﴿٤٥﴾

आणि  आम्ही यहूद्यांवर या गोष्टींची जबाबदारी तौरात मध्ये निश्चित करून दिली होती की, जिवाबद्दल जीव, डोळ्याबद्दल डोळा आणि नाकाच्या बदली नाक आणि कानाच्या बदली कान आणि दाताच्या बदली दात आणि खास जखमांचा पण बदला आहे[८]; मग जो मनुष्य याला माफ करून टाकेन, तर ते त्याच्यासाठी प्रायश्चित्त आहे; आणि जो मनुष्य अल्लाहने अवतरीत केल्याप्रमाणे, आदेश देणार नाही, तेच लोक जालीम आहेत[९] ४५

وَقَفَّيْنَا عَلٰٓى اٰثَارِهِمْ بِعِيسَى ابْنِ مَرْيَمَ مُصَدِّقًا لِّمَا بَيْنَ يَدَيْهِ مِنَ التَّوْرٰىةِ ۪ وَاٰتَيْنٰهُ الْاِنْجِيلَ فِيهِ هُدًى وَّنُورٌ ۙ وَّمُصَدِّقًا لِّمَا بَيْنَ يَدَيْهِ مِنَ التَّوْرٰىةِ وَهُدًى وَّمَوْعِظَةً لِّلْمُتَّقِينَ ﴿٤٦﴾

आणि आम्ही त्यांच्यामागे, ईसा बिन मर्यम (अ.) ला पाठविले; जे आपल्या पूर्वीचे पुस्तक म्हणजे ''तौरात'' सत्य असल्याची हमी भरत होते[१०], आणि आम्ही त्यांना 'इंजील' प्रदान केले, ज्यांत प्रकाश आणि मार्गदर्शन होते, आणि ते आपल्या पूर्वीचे पुस्तक तौरात सत्य असल्याची हामी भरत होते आणि हा सरासर मार्गदर्शन आणि उपदेश होता सदाचरणी लोकांसाठी[११] ४६

१) 'सम्माउनाचा' अर्थ आहे, 'पुष्कळ जास्त ऐकणारा' याचे दोन प्रकार होऊ शकतात, हेरगिरी करण्यासाठी जास्त गोष्टी ऐकणे, किंवा दुसऱ्यांच्या गोष्टी मान्य करण्यासाठी आणि कबूल करण्यासाठी ऐकणे. काही भाष्यकारांनी पहिला अर्थ ग्राह्य धरला आहे, आणि काहींनी दुसरा.

२) 'लिल्लजीना हादू' याचा संबंध, 'यहकुमु' शी आहे. म्हणजे यहूद्यांशी संबंधीत निर्णय करीत असत.

३) 'असलमु' हे 'नबीय्यीन' चे वैशिष्ट्य सांगितले की, ते सर्व पैगंबर इस्लाम धर्माचेच अनुयायी होते; ज्याकडे ह.मुहम्मद عليه السلام आवाहन करीत आहे. म्हणजे सर्व पैगंबरांचा धर्म एकच राहिला आहे 'इस्लाम.' ज्याचे आधारभूत आवाहन हे होते की, एका अल्लाहची उपासना केली जावी. आणि त्याच्या उपासनेत कोणाला सामील न केले जावे. प्रत्येक पैगंबराने आपल्या समाजाला हेच एकेश्वरवादाचे आवाहन आणि निखालसता सादर केली, ''आम्ही

आपल्यापूर्वी जेवढे रसूल पाठविले, त्यांना हेच वह्य केले की, माझ्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही; तुम्ही सर्व माझीच उपासना करा.'' (सू. अंबिया-२५) यालाच कुरआनांत, ''अद्दीन' पण म्हणण्यांत आले आहे. जसे की, सू.शुरा आ.क्र.१३, मध्ये सांगण्यांत आले आहे, ज्यांच्यांत याच विषयाचे वर्णन करण्यांत आले आहे की, आपणासाठी आम्ही तोच धर्म निश्चित केला आहे, जो आपल्यापूर्वी दुसऱ्या पैगंबरांसाठी होता.

४) म्हणून त्यांनी तौरातमध्ये काही फेरबदल केला नाही; जसा मागून लोकांनी केला.

५) हे पुस्तक कमी जास्त करण्यापासून सुरक्षित आहे. आणि अल्लाहतआलाकडून अवतरीत झाले आहे.

६) म्हणजे लोकांना भिऊन, तौरातच्या मूळ आदेशांवर पडदा टाकूं नका; तसेच थोड्याशा ऐहिक फायद्यासाठी त्यांत रद्दबदल करूं नका.

७) मग तुम्ही कसे ईमानच्या बदल्यात कुफ्रवर राजी होऊन गेलात ?

८) जेव्हा तौरातमध्ये जीवाच्या बदल्यांत जीव आणि जखमांत 'किसास' चा हुकूम दिला गेला होता, तर यहूद्यांचे एक घराणे (बनु नजीर) चे दुसरे घराणे, (बनु कुरैजा) च्या बरोबर याच्या उलट व्यवहार करणे, आणि आपल्या ठार झालेल्याचे प्राणमूल्य दुसऱ्या घराण्याच्या ठार झालेल्याच्या तुलनेत दुप्पट ठेवण्याचा काय अर्थ आहे ? जसे की याचा तपशील मागील पृष्ठांमध्ये येऊन गेला.

९) हा इशारा आहे त्या गोष्टीकडे की, ज्या घराण्याने चर्चित निर्णय केला होता, हा अल्लाहच्या अवतरीत केलेल्या हुकूमाच्या विरूद्ध होता. आणि त्यांनी अशा प्रकारे अन्याय केला. जणूं मनुष्य या गोष्टीला बांधील आहे की, त्याने अल्लाहच्या आदेशांचे पालन करावे, याच्याप्रमाणेच निर्णय करावेत. आणि जीवनाच्या सर्व व्यवहारांमध्ये याच्याचकडून मार्गदर्शन प्राप्त करावे. जर त्याने असे केले नाही, तर अल्लाहच्या समक्ष अन्यायी ठरवला जाईल. आज्ञाभंजक म्हणविला जाईल, काफिर म्हटला जाईल. अशा लोकांसाठी अल्लाहतआलाने तिन्ही शब्द वापरून आपला राग आणि नाराजीचे भरपूर प्रदर्शन करून दिले. याच्यानंतर सुद्धा मनुष्य आपणच निर्माण केलेल्या कायदे किंवा आपल्या इच्छेलाच महत्त्व देईल, तर यापेक्षा जास्त दुर्भाग्य काय असेल?

**मलहुजा** : तत्त्व पाळणाऱ्या धर्मपंडितांनी लिहिले आहे की, मागच्या धर्मशास्त्राचा हुकूम जर अल्लाहने कायम ठेवला आहे, तर आमच्यासाठी सुद्धां त्याच्यावर अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. आणि या महावाक्यात वर्णन केलेला आदेश रद्द झालेला नाही. म्हणून हे सुद्धा इस्लामी धर्मशास्त्राचेच आदेश आहेत. जसे की हदीसींनी याचे समर्थन होते. याचप्रमाणे हदीसींनी जीवाच्या बदल्यात जीव या सर्व साधारण नियमाला दोन प्रकार निष्कासित होतील की, जर कोणी मुसलमान कोण्या काफिराला ठार करेल, तर 'किसास' मध्ये, काफिराच्या बदल्यांत मुसलमानाला याचप्रमाणे गुलामच्या बदल्यात स्वतंत्र व्यक्तीला ठार मारले जाणार नाही. (तपशिलासाठी कृपया पहावे, फत्हुल बारी, नैलूल अवतार वगैरे)

१०) म्हणजे पूर्वीच्या पैगंबरांच्या लगेचच नंतर ह.ईसा عليه السلام ला पाठविले, जे आपल्यापूर्वी अवतरीत झालेल्या पुस्तक तौरातला मान्यता देणारे होते. त्याला नाकारणारे नव्हते. जो या गोष्टीचा पुरावा होता की, ह.ईसा عليه السلام सुद्धा अल्लाहचे खरे पैगंबर आहेत; आणि त्याच अल्लाहचे पाठविलेले आहेत, ज्याने तौरात ह.मूसा عليه السلام वर अवतरीत केली होती. तर यावर सुद्धा यहूद्यांनी ह.ईसा عليه السلام ला खोटे ठरविले, किंबहुना नाकारले आणि कमी लेखले आणि अपमान केला.

११) म्हणजे ज्याप्रमाणे तौरात आपल्याकाळी लोकांकरीता मार्गदर्शनाचे साधन होते, त्याचप्रमाणे इंजीलच्या अवतरणानंतर हाच दर्जा इंजीलला प्राप्त झाला आणि मग कुरआन करीमच्या अवतरणानंतर तौरात, इंजील आणि दुसरे आकाशी सहीफिवर अंमलबजावणी रद्द झाली आणि मार्गदर्शनाचे आणि मुक्तीचे एकुलते एक साधन कुरआन करीमच राहून गेले. आणि यावरच अल्लाहतआलाने आकाशी ग्रंथांचा क्रम संपवून टाकला. हे जणूं याच गोष्टीचे जाहीर करणे आहे की, कयामतपर्यंत जन्म घेणाऱ्या मानवांची सफलता आणि यश याच कुरआनाशी निगडीत आहे, ज्याने याला घट्ट धरून ठेवले तो यशस्वी ठरेल आणि जो यापासून विभक्त झाला, त्याच्या निशीबी अपयश आणि असफलता आहे. याने ठाऊक झाले की, 'सर्व धर्मसमभाव' चे तत्त्वज्ञान एकदम चूक आहे. सत्य प्रत्येक काळी एकच राहिले आहे; वेगवेगळे नाही. सत्याशिवाय दुसऱ्या गोष्टी निरर्थक आहेत.तौरात आपल्या काळांतील सत्य होते. त्याच्यानंतर इंजील आपल्या काळांतील सत्य होते. इंजीलच्या अवतरणानंतर तौरातवर अंमलबजावणी करणे योग्य नव्हते. आणि जेव्हा कुरआन अवतरीत झाले, तेव्हा इंजील रद्द होऊन गेले, इंजीलवर अंमलबजावणी करणे योग्य राहिले नाही. आणि फक्त कुरआनच अंमलबजावणी आणि मुक्तीसाठी आवश्यक बनून गेले आहे. याच्यावर ईमान आणल्याशिवाय, म्हणजे ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीला मान्य केल्याशिवाय मुक्ती मिळणे शक्य नाही. कृपया आणखी पहावे सू.बकर: आ. ६२ चा समास.

وَلْيَحْكُمْ أَهْلُ الْإِنْجِيلِ بِمَا أَنْزَلَ اللَّهُ فِيهِ ۚ وَمَنْ
لَمْ يَحْكُمْ بِمَا أَنْزَلَ اللَّهُ فَأُولَٰئِكَ هُمُ الْفَاسِقُونَ ﴿٤٧﴾

**आणि इंजीलवाल्यांना पण पाहिजे की, अल्लाहतआलाने जे काही 'इंजील' मध्ये अवतरीत केले आहे,त्याच्याचप्रमाणे हुकूम करावा[(१)]; आणि जो अल्लाहच्या अवतरीत केल्याप्रमाणे हुकूम करणार नाही, तो (कुकर्म करणारा) आज्ञाभंजक आहे ﴿٤٧﴾**

وَأَنْزَلْنَا إِلَيْكَ الْكِتَابَ بِالْحَقِّ مُصَدِّقًا لِمَا بَيْنَ
يَدَيْهِ مِنَ الْكِتَابِ وَمُهَيْمِنًا عَلَيْهِ ۖ فَاحْكُمْ
بَيْنَهُمْ بِمَا أَنْزَلَ اللَّهُ ۖ وَلَا تَتَّبِعْ أَهْوَاءَهُمْ عَمَّا جَاءَكَ
مِنَ الْحَقِّ ۚ لِكُلٍّ جَعَلْنَا مِنْكُمْ شِرْعَةً وَمِنْهَاجًا ۚ
وَلَوْ شَاءَ اللَّهُ لَجَعَلَكُمْ أُمَّةً وَاحِدَةً وَلَٰكِنْ لِيَبْلُوَكُمْ
فِي مَا آتَاكُمْ ۖ فَاسْتَبِقُوا الْخَيْرَاتِ ۚ إِلَى اللَّهِ مَرْجِعُكُمْ
جَمِيعًا فَيُنَبِّئُكُمْ بِمَا كُنْتُمْ فِيهِ تَخْتَلِفُونَ ﴿٤٨﴾

**आणि आम्ही आपल्याकडे सत्यासह हे पुस्तक अवतरीत केले आहे. जे आपल्यापूर्वीच्या पुस्तकांना मान्य करणारे आहे आणि त्यांचे संरक्षणकर्ते आहे[(२)]. म्हणून आपण यांच्या आपसातल्या व्यवहारात, अल्लाहच्या अवतरीत केलेल्या याच (पुस्तक) प्रमाणे हुकूम[(३)] करावा. या सत्यापासून विचलीत होऊन, त्यांच्या मनोकामनेचे अनुकरण करू नये[(४)]. तुमच्यातून प्रत्येकासाठी आम्ही एक दस्तुर आणि मार्ग निश्चित करून दिला आहे[(५)] आणि जर अल्लाहला मंजूर असते, तर तुम्हा सर्वांना एकच उम्मत बनवून दिले असते, परंतु त्याची इच्छा आहे की, जे तुम्हास दिले आहे; त्यात तुम्हाला आजमवावे[(६)]. तुम्ही पुण्याकडे (जाण्यात) त्वरा करावी. तुम्हा सर्वांस अल्लाहकडेच परतून जाणे आहे. मग तो तुम्हास प्रत्येक गोष्ट दाखवून देईल, ज्यात तुम्ही मतभेद करीत राहतात ﴿٤٨﴾**

१) इंजीलवाल्यांना हा हुकूम त्यावेळपावेतो होता, जो पर्यंत ह.ईसा ﷵ च्या पैगंबरीचा काळ होता. नबी ﷺ च्या पैगंबरी मिळाल्यानंतर, ह.ईसा ﷵ चा पैगंबरीचा काळ संपून गेला. आणि इंजीलच्या अनुकरणाचा सुद्धा. आता ईमानदार तोच समजला जाईल, जो ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणेल. आणि कुरआन करीमचे आज्ञापालन करेल.

२) प्रत्येक आकाशी ग्रंथ, आपल्या पूर्वीच्या पुस्तकाला सत्य ठरणारा राहिला आहे. ज्याप्रमाणे कुरआन मागील पुस्तकांना सत्य ठरवणारे आहे. आणि सत्य ठरवण्याचा अर्थ आहे की, ही सर्व पुस्तके खरोखरच अल्लाहतआलाकडूनच अवतरीत झालेली आहेत. परंतु कुरआन सत्य ठरवण्याऱ्याबरोबरच 'मुहैमिन' (संरक्षणकर्ते ,विश्वसनीय, साक्षीदार आणि न्यायाधीश) पण आहे. म्हणजे मागील पुस्तकांत फेरबदल व घालघुसड ही झाल्याने कुरआनाचा निर्णयच लागू होईल ज्याला हे बरोबर ठरवेल, तेच खरे मानले जाईल. बाकी सर्व निरर्थक आहे.

३) याच्यापूर्वी आयात क्र.४२ मध्ये नबी ﷺ ला अधिकार देण्यात आला होता की, आपण त्यांच्या प्रकरणाचे निर्णय करावे की करू नये, ही आपली मर्जी आहे. परंतु आता, याच्याऐवजी हा हुकूम देण्यात येत आहे की, त्यांच्या आपसातील प्रकरणांत सुद्धा कुरआन करीमप्रमाणे निर्णय देत चला.

४) हे वास्तविक 'उम्मत' ला शिक्षण देण्यांत येत आहे की, अल्लाहच्या अवतरीत केलेल्या पुस्तकाला सोडून लोकांच्या इच्छा आणि मनोकामना किंवा त्यांनी स्वत:च निर्माण केलेले संकल्प व विचारसरणी प्रमाणे निर्णय करणे म्हणजे मार्गभ्रष्ट होणे आहे. ज्याची परवानगी जेव्हा पैगंबरांना नाही, तर कोण्या इतराला कशी प्राप्त होऊ शकते?

५) याच्याने अभिप्रेत मागील धर्मशास्त्रे आहेत; ज्यांचे काही कर्मासंबंधीचे आदेश, एक दुसऱ्यांपेक्षा वेगवेगळे होते. एका धर्मशास्त्रात काही वस्तू हराम तर दुसऱ्यात हलाल होती. काहींमध्ये कोण्या समस्येत सक्ती होती तर दुसऱ्यांत कमी, परंतु धर्म सर्वांचा एक, म्हणजे एकेश्वरवादावर आधारित होता. या अनुषंगाने सर्वांचे आवाहन एकच होते. या विषयाला एका हदीसमध्ये अशाप्रकारे वर्णन करण्यांत आले आहे, ''आम्ही पैगंबराचा समूह, अल्लाती (ज्यांचा बाप एक आणि आई वेगवेगळ्या असे) भाऊ आहोत आमचा धर्म एक आहे'' (सहीह बुखारी) अर्थ हा की त्यांचा धर्म एकच होता. आणि शरिअती (दस्तुर आणि पद्धती) वेगवेगळ्या होत्या. परंतु शरिअते मुहम्मदिया ﷺ च्या नंतर आता सर्व शरिअती पण रद्द होऊन गेल्या आहेत. आणि आता धर्मपण एक आहे. आणि शरिअत पण एक.

६) म्हणजे कुरआनाच्या अवतरणानंतर आता मुक्ती तर याच्याशीच संबंधीत आहे, परंतु या मुक्तीच्या मार्गाला अंगिकारण्यासाठी अल्लाहतआलाने मानवावर सक्ती केलेली नाही; नाही तर तो इच्छिता, तर असे करू शकत होता. परंतु अशाने तुम्हाला आजमाविणे शक्य झाले नसते. जेव्हा की तो तुम्हाला आजमावू इच्छितो.

وَاَنِ احْكُمْ بَيْنَهُمْ بِمَآ اَنْزَلَ اللّٰهُ وَلَا تَتَّبِعْ اَهْوَآءَهُمْ وَاحْذَرْهُمْ اَنْ يَّفْتِنُوْكَ عَنْۢ بَعْضِ مَآ اَنْزَلَ اللّٰهُ اِلَيْكَ ؕ فَاِنْ تَوَلَّوْا فَاعْلَمْ اَنَّمَا يُرِيْدُ اللّٰهُ اَنْ يُّصِيْبَهُمْ بِبَعْضِ ذُنُوْبِهِمْ ؕ وَاِنَّ كَثِيْرًا مِّنَ النَّاسِ لَفٰسِقُوْنَ ﴿٤٩﴾

**आपण त्यांच्या प्रकरणांत अल्लाहने नाजील केलेल्या वहय प्रमाणेच, हुकूम देत चला. त्यांच्या मनोकामनेच्या अंकीत होऊ नका. आणि त्यांच्यापासून सावध रहावे की, कोठे ते आपणास अल्लाहच्या उतारलेल्या हुकूमापासून इकडे तिकडे न करून टाकोत. जर हे लोक तोंड फिरवतील तर विश्वास ठेवा की, अल्लाहचा विचारपण हाच आहे की, त्यांना त्यांच्या काही अपराधांची शिक्षा करूनच टाकावी. आणि बहुतेक लोक आज्ञाभंजकच असतात ४९**

اَفَحُكْمَ الْجَاهِلِيَّةِ يَبْغُوْنَ ؕ وَمَنْ اَحْسَنُ مِنَ اللّٰهِ حُكْمًا لِّقَوْمٍ يُّوْقِنُوْنَ ﴿٥٠﴾

**काय हे लोक पुन्हा अडाणीपणाचाच निर्णय इच्छितात?[१] विश्वास ठेवणाऱ्या लोकांसाठी अल्लाहतआलापेक्षा चांगला निर्णय आणि हुकूम देणारा कोण असू शकतो[२]? ५०**

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَتَّخِذُوا الْيَهُوْدَ وَالنَّصٰرٰۤى اَوْلِيَآءَ ۘ بَعْضُهُمْ اَوْلِيَآءُ بَعْضٍ ؕ وَمَنْ يَّتَوَلَّهُمْ مِّنْكُمْ فَاِنَّهٗ مِنْهُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يَهْدِى الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ﴿٥١﴾

**हे ईमानवाल्यांनो! तुम्ही यहूदी आणि खिस्त्यांना दोस्त बनवू नका[३]. हे तर आपसांतच एक दुसऱ्याचे मित्र आहेत[४]. तुमच्यातून जोपण त्यांच्याशी मैत्री करेल, तो नि:संशय त्यांच्यातूनच आहे. जालीमांना अल्लाहतआला कधीच योग्य मार्ग दाखवित नसतो[५]. ५१**

१) आता कुरआन आणि इस्लाम शिवाय सर्व अज्ञान आहे, काय हे आतांसुद्धा प्रकाश आणि मार्गदर्शनाला (इस्लाम) सोडून, अज्ञाानाचे शोधक आणि इच्छुक आहेत? चौकशी नाकारणे आणि कान उघडणीसाठी आहे. म्हणजे ''तुझ्या त्या निर्णयाने, जो अल्लाहने तुझ्यावर अवतरीत केला आहे, हे आक्षेप घेतात, आणि पाठ फिरवतात, आणि अज्ञानकाळाच्या पद्धतीचे इच्छुक आहेत.'' (फत्हुल कदीर) हे महावाक्य, आणि याच्याच सारखा अर्थ असलेली हदीसे नबवी ﷺ जी पुढे येत आहे, आजकालच्या मुसलमान सत्ताधिकाऱ्यांसाठी, काळजी करण्यासारखे आहे, जे इस्लामी देशांमध्ये इस्लामी शिक्षणाऐवजी,नव्या अडाणीपणाला बाळगून आहेत, आणि त्याला प्रोत्साहन देत आहेत. म्हणजे इस्लामी देशांमध्ये इस्लाम कैदेत आणि आज्ञांकित आहे; आणि अडाणीपणाचे वर्चस्व आहे, हे अत्याचारी आणि इस्लामपासून फिरून गेलेले सत्ताधीश आहेत हे अल्लाहतआलाला कसे काय तोंड दाखवणार? असे वाटते की, अल्लाहतआलाजवळ विचारपूस होईल यावर यांचा विश्वासच नाही.

२) हदीस मध्ये येते, नबी ﷺ नी फरमाविले, ''अल्लाहला सर्वांत नावडता तो मनुष्य आहे, जो इस्लाममध्ये अज्ञानपणाच्या पद्धतीचा इच्छुक असावा आणि जो नाहक कोणाचा खून करण्याची इच्छा बाळगणारा असावा'' (स.बुखारी किताबुल दियात)

३) यांत यहूदी आणि खिस्त्यांशी दोस्ती आणि प्रेमाचे नाते कायम करण्याला मना करण्यात आले आहे; जे इस्लाम आणि मुसलमानांचे दुष्मन आहेत आणि यांवर इतकी कडक धमकी देण्यांत आली आहे की, जो त्यांच्याशी मैत्री ठेवेल, तो त्यांच्यातूनच समजला जाईल. (आणखी पहावे, सू.आले इमरान आ. २८ आणि आ. ११८ चा समास)

४) कुरआनाच्या या वर्णन केलेल्या हकीकतीचा साक्षात्कार, प्रत्येक मनुष्य करू शकतो; की यहूदी आणि खिस्त्यांचा जरी आपसांत श्रद्धेच्या दृष्टीने तीव्र मतभेद आणि आपसांत द्वेष आणि मत्सर आहे; तरी असे असून सुद्धा हे इस्लाम आणि मुसलमानांच्या विरोधात, एक दुसऱ्याचे मदतगार, पक्ष धरणारे आणि संरक्षक आहेत, 'इस्राईल' जे एक यहूदी राष्ट्र आहे, त्याचे अस्तित्वच बेकायदेशीर आणि न्यायाच्या लागू केलेल्या तत्त्वाच्या विरुद्ध आहे. परंतु असे असूनसुद्धा त्याला कायम करण्यात इंग्लंड आणि युरोपच्या खिस्ती शक्तींनी भरपूर वाटा घेतला; आणि त्याची खूप मदत केली. आणि मग कायम झाल्यानंतर त्याची कृत्ये सतत नुकसानकारक, अन्यायपूर्ण आणि जुलूम करणारी आहेत. परंतु तरी सुद्धा चर्चित खिस्ती शक्त्या, त्याचे संरक्षणकर्ते आणि त्यांना पाठबळ देणारे म्हणून कार्यरत आहे. आणि अशा प्रकारे हा मध्यपूर्वेचा भगंदर, ज्याला संपवून टाकण्याची फारच आवश्यकता होती, यहूदी खिस्त्यांच्या गठबंधनाने पसरत आणि वाढत आहे; आणि त्याच्या भयानकतेत दररोज वाढच होत आहे.

५) या महावाक्यांच्या अवतरणाच्या कारणात, वर्णन करण्यांत येते की, ह.उबादा बिन सामित अन्सारी आणि दांभिकांचा सरदार अब्दुल्लाह बिन उबई दोहोपण अज्ञानकालापासून, यहूद्यांचे मददगार, साथी, मित्र होते. जेव्हा बद्रमध्ये मुसलमानांना विजय मिळाला, तेव्हा अब्दुल्लाह् बिन उबईने सुद्धा इस्लाम स्वीकारल्याचे जाहीर केले. इकडे बनुकैनकाच्या यहूद्यांनी थोड्याच दिवसानंतर फसाद केला आणि ते बंदी झाले. त्यावर उबादा رضي الله عنه नी आपल्या यहूदी साथीदारांकडून अंग काढून घेतल्याचे जाहीर केले. परंतु अब्दुल्लाह बिन उबईने, याच्या उलट यहूद्यांना वाचविण्याचा भरपूर प्रयत्न केला. ज्यावर ही महावाक्ये अवतीर्ण झालीत.

فَتَرَى الَّذِينَ فِي قُلُوبِهِم مَّرَضٌ يُسَارِعُونَ فِيهِمْ يَقُولُونَ نَخْشَىٰ أَن تُصِيبَنَا دَائِرَةٌ ۚ فَعَسَى اللَّهُ أَن يَأْتِيَ بِالْفَتْحِ أَوْ أَمْرٍ مِّنْ عِندِهِ فَيُصْبِحُوا عَلَىٰ مَا أَسَرُّوا فِي أَنفُسِهِمْ نَادِمِينَ ﴿٥٢﴾

आपण पहाल की, ज्यांच्या मनांत रोग आहे[१], ते धावून धावून त्यांच्यांत घुसत आहेत. आणि म्हणतात की, आम्हाला धोका आहे, असे न व्हावे की, कोणी प्रसंग आमच्यावर येऊन पडावा[२]. फार शक्य आहे की, अल्लाहतआला विजय प्राप्त करून देईल[३], किंवा आपल्याकडून काही आणखी गोष्ट घडवून आणेल[४].मग तर हे आपल्या मनांत लपविलेल्या गोष्टींवर फारच लज्जीत होऊं लागतील ५२

وَيَقُولُ الَّذِينَ آمَنُوا أَهَٰؤُلَاءِ الَّذِينَ أَقْسَمُوا بِاللَّهِ جَهْدَ أَيْمَانِهِمْ ۙ إِنَّهُمْ لَمَعَكُمْ ۚ حَبِطَتْ أَعْمَالُهُمْ فَأَصْبَحُوا خَاسِرِينَ ﴿٥٣﴾

आणि ईमानवाले म्हणतील, काय हेच ते लोक आहेत, जे मोठ्या जोरा जोराने अल्लाहच्या शपथा खाऊन खाऊन म्हणतात की, आम्ही तर तुमच्या बरोबर आहोत; त्यांची कर्मे अकारत गेली; आणि ते अयशस्वी होऊन गेले ५३

الثلثة

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا مَن يَرْتَدَّ مِنكُمْ عَن دِينِهِ فَسَوْفَ يَأْتِي اللَّهُ بِقَوْمٍ يُحِبُّهُمْ وَيُحِبُّونَهُ أَذِلَّةٍ عَلَى الْمُؤْمِنِينَ أَعِزَّةٍ عَلَى الْكَافِرِينَ يُجَاهِدُونَ فِي سَبِيلِ اللَّهِ وَلَا يَخَافُونَ لَوْمَةَ لَائِمٍ ۚ ذَٰلِكَ فَضْلُ اللَّهِ يُؤْتِيهِ مَن يَشَاءُ ۚ وَاللَّهُ وَاسِعٌ عَلِيمٌ ﴿٥٤﴾

हे ईमानवाल्यांनो ! तुमच्यातून जो मनुष्य, आपल्या धर्माकडून फिरून जाईल, तर[५] अल्लाहतआला लवकरच अशा लोकांना घेऊन येईल,जे अल्लाहचे प्रिय असतील. आणि ते पण अल्लाहशी प्रेम करीत असतील[६]. ते मृदु अंत:करणाचे असतील मुसलमानांवर आणि सख्त आणि तीव्र असतील काफिरांवर. अल्लाहच्या मार्गात 'जिहाद' करतील.आणि कोण्या निंदा करणाऱ्यांच्या निंदेची पर्वा करणार नाही[७]. ही आहे, अल्लाहतआलाची कृपा, ज्याला इच्छेल (त्याला) देईल. अल्लाहतआला सर्वव्यापी आणि वाकबगार आहे ५४

१) याच्याने अभिप्रेत ढांभिकपणा आहे. म्हणजे ढांभिक लोक यहूद्यांशी प्रेम आणि मैत्री करण्यांत घाई करीत आहे.

२) म्हणजे मुसलमानांचा पराजय व्हावा; आणि यामुळे आम्हाला पण काही नुकसान सोसावे लागेल. यहुद्यांशी मैत्री असेल, तर असा प्रसंग आमच्यासाठी मोठा कामा येईल.

३) म्हणजे मुसलमानांना.

४) किंवा यहूदी आणि खिस्त्यांवर 'जिझीया' लागू करून द्यावा; किंवा इशारा आहे, बनु कुरैजा ला ठार करणे आणि त्यांच्या संततीला कैदी बनविणे; आणि बनु नजीरला हद्दपार करणे, वगैरेकडे. ज्या घटना नजीकच्या भविष्यकाळांत घडल्या.

५) अल्लाहतआलाने आपल्या ज्ञानाप्रमाणे ज्या गोष्टी सांगितल्या; त्या गोष्टी नबी करीम ﷺ च्या मृत्यूनंतर लगेच घडल्या. हे धर्माकडून फिरून जाण्याच्या फित्न्याचे अंताचे श्रेय ह.अबुबकर सिद्दीक رضي الله عنه आणि त्यांच्या साथीदारांना मिळाले. रजी. अल्लहु अन्हुम.

६) धर्माकडून फिरून जाणाऱ्यांच्या मुकाबल्यांत, ज्या समाजाला अल्लाहतआला उभा करील, त्यांची चार ठळक वैशिष्ट्ये वर्णन करण्यांत येत आहेत,

(अ) अल्लाहवर प्रेम करणे आणि त्याचे प्रिय होणे (ब) ईमानवाल्यांसाठी मृढु आणि काफिरांसाठी कडक होणे (क) अल्लाहच्या मार्गात जिहाद करणे. (ड) आणि अल्लाहच्या बाबतीत, कोणाच्या निंढेला न भिणे. सहाबा कराम रिजवानुल्लाही अलैहिम अजमअीन, या वैशिष्ट्य आणि चांगुलपणाचे नमुने होते; म्हणून अल्लाहतआलाने त्यांना इहलोकांत आणि परलोकांत सद्भाग्य प्रदान केले आणि या जगांतच आपल्या प्रसन्नतेचे प्रमाणपत्र देऊन टाकले.

७) हे त्या ईमानवाल्यांचे चौथे वैशिष्ट्ये आहे. म्हणजे अल्लाहतआलाच्या आज्ञापालनांत, त्यांना कोण्या निंदा करण्याच्या निंदेची पर्वा असणार नाही. हे पण फार महत्त्वाचे वैशिष्ट्ये आहे. समाजात ज्या वाईट गोष्टींचे चलन सर्व साधारण होऊन जाते; त्याच्या विरोधात पुण्यावर दृढतेने जमून जाणे, आणि अल्लाहच्या हुकूमांचे पालन, या वैशिष्ट्याशिवाय शक्य नाही. नाहीतर कित्येक लोक आहेत, जे वाईट गोष्टींपासून अल्लाहच्या आज्ञाभंजनापासून आणि सामाजिक वाईट कृत्यांपासून आपल्या स्वत:ला वाचवू इच्छितात. परंतु निंदा करणाऱ्यांचा सामना करण्याची हिंमत स्वत:त असत नाही. परिणाम हा होतो की, ते या वाईट गोष्टींच्या दलदलीतून बाहेर निघूंशकत नाही आणि असत्यापासून वाचण्याची सुबुद्धी त्यांना प्राप्त होत नाही. म्हणून पुढे अल्लाहतआलाने फर्माविले की,ज्यांना चर्चित वैशिष्ट्ये प्राप्त होऊन जातील, तर ती अल्लाहची त्यांच्यावर खास कृपा आहे.

إِنَّمَا وَلِيُّكُمُ اللّٰهُ وَرَسُولُهُ وَالَّذِينَ آمَنُوا الَّذِينَ يُقِيمُونَ الصَّلٰوةَ وَيُؤْتُونَ الزَّكٰوةَ وَهُمْ رٰكِعُونَ ﴿٥٥﴾

मुसलमानांनो! तुमचा मित्र स्वत: अल्लाहतआला आहे, आणि त्याचा पैगंबर आहे, आणि ईमानवाले आहेत[१], जे नमाजीची पाबंदी करतात आणि जकात देतात आणि रुकूअ (व्याकुळता व नम्रता) करणारे आहेत ५५

وَمَنْ يَتَوَلَّ اللّٰهَ وَرَسُولَهُ وَالَّذِينَ آمَنُوا فَإِنَّ حِزْبَ اللّٰهِ هُمُ الْغٰلِبُونَ ﴿٥٦﴾

आणि जो मनुष्य अल्लाहतआलाशी आणि त्याच्या पैगंबराशी आणि मुसलमानांशी मैत्री करेल, त्याने जाणून घ्यावे की, अल्लाहतआलाचा (माणणारा) समूहच वरचढ राहील[२] ५६

يٰٓأَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تَتَّخِذُوا الَّذِينَ اتَّخَذُوا دِينَكُمْ هُزُوًا وَلَعِبًا مِّنَ الَّذِينَ أُوتُوا الْكِتٰبَ مِنْ قَبْلِكُمْ وَالْكُفَّارَ أَوْلِيَآءَ ۚ وَاتَّقُوا اللّٰهَ إِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِينَ ﴿٥٧﴾

हे ईमानवाल्यांनो! अशा लोकांना मित्र बनवूं नका, जे तुमच्या धर्माला हंशी आणि खेळ बनवूंन आहेत, मग ते त्यातून असोत, ज्यांना तुमच्यापूर्वी पुस्तक दिले, किंवा काफिर असतील[३]; जर तुम्ही ईमानवाले असाल तर, अल्लाहतआलाला भित रहा ५७

وَإِذَا نَادَيْتُمْ إِلَى الصَّلٰوةِ اتَّخَذُوهَا هُزُوًا وَّلَعِبًا ۭ ذٰلِكَ بِأَنَّهُمْ قَوْمٌ لَّا يَعْقِلُونَ ﴿٥٨﴾

आणि जेव्हा तुम्ही नमाजीसाठी पुकारतात, तर ते याला हंशी खेळ ठरवून घेतात[४]. हे यासाठी की, अक्कल बाळगत नाहीत. ५८

قُلْ يٰٓأَهْلَ الْكِتٰبِ هَلْ تَنْقِمُونَ مِنَّآ إِلَّآ أَنْ آمَنَّا بِاللّٰهِ وَمَآ أُنْزِلَ إِلَيْنَا وَمَآ أُنْزِلَ مِنْ قَبْلُ ۙ وَأَنَّ أَكْثَرَكُمْ فٰسِقُونَ ﴿٥٩﴾

आपण सांगून टाका की, हे यहूद्यांनो आणि ख्रिस्त्यांनो! तुम्ही फक्त या कारणाने शत्रुत्व करीत आहांत की आम्ही अल्लाहवर आणि जे काही आमच्याकडे अवतरीत करण्यात आले आहे; आणि जे काही याच्यापूर्वी उतारण्यांत आले आहे; यावर ईमान आणले आहे आणि यासाठी सुंद्धा की, तुमच्यातून बहुतेक आज्ञाभंजक आहेत ५९

قُلْ هَلْ أُنَبِّئُكُمْ بِشَرٍّ مِّنْ ذٰلِكَ مَثُوبَةً عِنْدَ اللّٰهِ ۭ مَنْ لَّعَنَهُ اللّٰهُ وَغَضِبَ عَلَيْهِ وَجَعَلَ مِنْهُمُ الْقِرَدَةَ وَالْخَنَازِيرَ وَعَبَدَ الطَّاغُوتَ ۭ أُولٰٓئِكَ شَرٌّ مَّكَانًا وَّأَضَلُّ عَنْ سَوَآءِ السَّبِيلِ ﴿٦٠﴾

आपण सांगून टाका की, काय मी तुम्हास दाखवू? की यापेक्षाही जास्त वाईट मोबदला मिळवणारा अल्लाहतआलाजवळ कोण आहे? तो ज्याला अल्लाहतआलाने शापित केले, आणि त्याच्यावर तो क्रोधीत झाला; आणि त्यांच्यातून काहींना माकडे आणि डुक्कर बनवूंन टाकले; आणि ज्यांनी निरर्थक उपास्यांची उपासना केली; हेच लोक वाईट दर्जाचे आहेत; आणि हेच योग्य मार्गापासून फारच भटकलेले आहेत[५] ६०

وَإِذَا جَآءُوكُمْ قَالُوٓا آمَنَّا وَقَدْ دَّخَلُوا بِالْكُفْرِ وَهُمْ قَدْ خَرَجُوا بِهٖ ۭ وَاللّٰهُ أَعْلَمُ بِمَا كَانُوا يَكْتُمُونَ ﴿٦١﴾

आणि जेव्हा तुमच्याजवळ येतात, तेव्हा म्हणतात की, आम्ही ईमान आणले; वास्तविक ते 'कुफ्र' घेऊनच आले होते; आणि त्याच कुफ्र बरोबर गेलेही. आणि हे जे काही लपवित आहे, त्याला अल्लाहतआला चांगले जाणतो[६] ६१

وَتَرٰى كَثِيرًا مِّنْهُمْ يُسٰرِعُونَ فِي الْإِثْمِ وَالْعُدْوَانِ وَأَكْلِهِمُ السُّحْتَ ۭ لَبِئْسَ مَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿٦٢﴾

आणि आपण त्यांना पहाल की, त्यांच्यातून बहुतेक पापकर्माकडे आणि जुलूम आणि अत्याचाराकडे आणि हराममाल खाण्याकडे ते एकदम तुटून पडतात. हे जे काही करीत आहे, ती फारच वाईट कामे होत ६२

१) जेव्हा यहूदी आणि ख्रिस्त्यांच्या दोस्तीपासून मना करण्यात आले, तर आता या प्रश्नांचे उत्तर देण्यात येत आहे की, मग त्यांनी मैत्री कुणाशी करावी? सांगितले की, ईमानवाल्यांचे मित्र सर्व प्रथम अल्लाह आणि त्यांचे पैगंबर आहेत, आणि मग त्यांना मानणारे ईमानवाले आहेत. पुढे त्यांची आणखी वैशिष्ट्ये वर्णन करण्यात येत आहे.

२) ही हिजबुल्लाह (म्हणजे अल्लाहला माणणारा समूह) चे अधोरेखन आणि त्याच्या वर्चस्वाची खुषखबर ऐकविली जात आहे. अल्लाहला मानणारा समूह तोच आहे, ज्याचा संबंध फक्त अल्लाह, पैगंबर आणि ईमानवाल्यांशी असेल. आणि काफिर, मुश्रिक, आणि यहूदी आणि ख्रिस्ती जरी ते त्यांचे जवळचे नातेवाईक असतील. त्यांनी प्रेम आणि मैत्रीचा संबंध ठेवू नये. जसे सू.मुजादलाहच्या शेवटी सांगितले आहे की, ''तुम्ही अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर

ईमान ठेवणाऱ्यांना असे पावणार नाही की, ते अशा लोकांशी प्रेम करतील, जे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे शत्रू असतील, मग जरी ते त्यांचे बाप असतील, त्यांचे मुलगे असतील, त्यांचेभाऊ असतील, किंवा त्यांच्या घराण्याचे आणि कुटुंबाचे लोक असोत.'' मग खुषखबर देण्यांत आली की, ''हे ते लोक आहेत, ज्यांच्या मनांत ईमान आहे, आणि ज्यांना अल्लाहची मदत प्राप्त आहे, त्यांनाच अल्लाहतआला स्वर्गात दाखल करेल. आणि हा अल्लाहतआलाचा (मानणारा) समूह आहे, सफलता त्यांच्या नशीबी लिहिली आहे.'' (सू.मुजादलाहचे शेवटचे महावाक्य)

३) ग्रंथधारी लोकांनी यहूदी आणि ख्रिस्ती आणि काफिरांनी बहुदेववादी अभिप्रेत आहेत. येथे पुन्हा तीच ताकीद करण्यात आली आहे की, धर्माला खेळ आणि थट्टामस्करी बनविणारे कारण की, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे शत्रू आहेत. म्हणून त्यांच्याबरोबर ईमानवाल्यांची मैत्री व्हावयास नको.

४) हदीसमध्ये येते की, जेव्हा शैतान अजानची आवाज ऐकतो, तेव्हा घाण हवा सोडत (पादत) पळून जातो. जेव्हा अजान संपून जाते, तेव्हा पुन्हा परत येतो. तकबीरच्या वेळी पुन्हा पाठ फिरवून चालता होतो. मग जेव्हा तकबीर संपते, तेव्हा परत येऊन नमाजींच्या मनांत वसवसे निर्माण करतो. अल् हदीस (स.बुखारी किताबुल अजान,स.मुस्लीम किताबुस्सलात.) शैतानाप्रमाणेच शैतानाच्या अनुयायांना अजानचा आवाज चांगला वाटत नाही. म्हणून ते याची टिंगल टवाळी करतात. या महावाक्याने हे पण ठाऊक झाले की, हदीसे रसूल ﷺ पण कुरआनाप्रमाणे धर्माचा माखज आणि त्याचप्रमाणे प्रमाण आहे. कारण की कुरआनाने नमाजीसाठी पुकारचा तर उल्लेख करून दिला आहे; परंतु ही पुकार कशाप्रकारे केली जावी? त्याचे शब्द काय असावेत? हे कुरआन करीममध्ये कोठेच नाही. या गोष्टी हदीसने सिद्ध आहेत. जो याचा तर्क आणि धार्मिक गोष्टी निघण्याचे ठिकाण (माखज) असण्याचा पुरावा आहे.

**हुज्रियते हदीसचा अर्थ** : हदीसचा धर्माचा माखज होण्याचा आणि धर्मशास्त्राचा तर्क (हुज्जत) होण्याचा अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे कुरआन करीमच्या स्पष्ट महावाक्यांनी (नस्स) सिद्ध होणारे आदेश आणि अनिवार्य गोष्टींवर अंमलबजावणी आवश्यक आणि त्यांना नाकारणे कुफ्र आहे. याचप्रमाणे रसूल ﷺ च्या हदीसने सिद्ध होणाऱ्या आदेशांना मानणेपण अनिवार्य आहे. त्यांच्यावर अमंलबजावणी करणे आवश्यक आणि त्यांना नाकारणे 'कुफ्र' आहे. तथापि हदीसचे बरोबर होणे मरफुअ आणि मुत्तसिल होणे आवश्यक आहे. मरफुअ आणि मुत्तसिल म्हणजे (ती हदीस ज्यांच्या रावीचा क्रम रसूल ﷺ पर्यंत पोहचतो) सही हदीस मग ती मुतवातिर (एका नंतर एक) असो किंवा आहाद, कौली (वचनाप्रमाणे किंवा शपथेप्रमाणे) असो फेअली (अमली) असो किंवा तकरीरी (म्हणजे आपण ﷺ च्या समोर कुणी काही काम केले तर आपण ﷺ नी त्यास रद्द केले नाही.) असो. हे सर्व अंमल करण्यास योग्य आहेत. हदीसचे एकच खबर होण्याच्या आधारावर किंवा कुरआनापेक्षा जास्त होण्याच्या आधारावर किंवा इमामांच्या (कयास) अटकळ किंवा अंदाज आणि (इजतहादात) चिंतन मनन करून कोण्या समस्येवर तोडगा काढणे याच्या आधारावर किंवा रावीच्या शरिअतचे ज्ञान कमी असण्याच्या दाव्यावर आधारित (अदमे फुकाहत) किंवा समजचे एका स्थितीतून दुसऱ्या स्थितीत जाणे (अकली इस्तहालात्) याच्या आधारावर किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या (दआवी) मागण्याच्या आधारावर, रद्द करणे योग्य नाही. हे सर्व हदीसपासून विन्मुख होण्याचे वेगवेगळे प्रकार आहेत. जे वेगवेगळ्या समूहांनी याच्या रद्द करण्याकरीता आणि नाकारण्यासाठी अंगिकारली आहेत. अआ जनल्लाहु मिनहा!

५) म्हणजे तुम्ही (अहो ग्रंथधारी लोकांनो!) आमच्याशी असेच नाराज आहात की, आमचा दोष हा आहे की, आम्ही अल्लाहवर आणि कुरआनावर आणि याच्यापूर्वी अवतरीत केलेल्या पुस्तकांवर ईमान ठेवतो. का हा पण काही अपराध आणि दोष आहे? म्हणजे ही दोषपूर्ण आणि निषेधार्ह बाब नाही. जसे की तुम्हास वाटते. म्हणून आम्ही तुम्हास दाखवितो की, वाईट लोक आणि मार्गभ्रष्ट लोक, जे तिरस्कार आणि निषेध करण्यांस योग्य आहेत कोण आहेत? हे ते लोक आहेत, ज्यांच्यावर अल्लाहचा शाप आणि प्रकोप झाला; आणि त्यांच्यातून काहींना अल्लाहने वानरे आणि डुकरे बनवून टाकले. आणि ज्यांनी निरर्थक उपास्यांची पुजा केली आणि या आरश्यांत आपला चेहरा आणि कर्तृत्व पाहून घ्या! की हा कोणाचा इतिहास आहे, आणि हे कोण लोक आहेत? काय तुम्हीच तर नाही आहात?

६) हा दांभिकांचा उल्लेख आहे, जे नबी करीम ﷺ च्या सेवेत 'कुफ्र' सह येतात आणि याच 'कुफ्र' बरोबर परत जातात. आपण ﷺ च्या सोबतीचा आणि आपल्या हितोपदेशाचा काही परिणाम त्यांच्यावर होत नाही. कारण की, मनात तर 'कुफ्र' लपलेले असते. आणि रसूल ﷺ च्या सेवेत, उपस्थितीचा उद्देश मार्गदर्शन प्राप्त करण्याचा नाही, परंतु धोका देणे व फसविण्याचा असतो. तर मग अशा परिस्थितीचा उपयोगच काय होऊ शकतो?

لَوْلَا يَنْهٰىهُمُ الرَّبّٰنِيُّوْنَ وَالْاَحْبَارُ عَنْ قَوْلِهِمُ الْاِثْمَ وَاَكْلِهِمُ السُّحْتَ ۭ لَبِئْسَ مَا كَانُوْا يَصْنَعُوْنَ ۝٦٣

**त्यांना यांचे उपासक आणि धर्मपंडित खोट्या गोष्टी सांगण्यापासून आणि हराम वस्तूं खाण्यापासून का मना करीत नाही? नि:संशय वाईट कामे आहेत, जी हे करीत आहे[१] ६३**

وَقَالَتِ الْيَهُوْدُ يَدُ اللّٰهِ مَغْلُوْلَةٌ ۭ غُلَّتْ اَيْدِيْهِمْ وَلُعِنُوْا بِمَا قَالُوْا ۘ بَلْ يَدٰهُ مَبْسُوْطَتٰنِ ۙ يُنْفِقُ كَيْفَ يَشَاۗءُ ۭ وَلَيَزِيْدَنَّ كَثِيْرًا مِّنْهُمْ مَّآ اُنْزِلَ اِلَيْكَ مِنْ رَّبِّكَ طُغْيَانًا وَّكُفْرًا ۭ وَاَلْقَيْنَا بَيْنَهُمُ الْعَدَاوَةَ وَالْبَغْضَاۗءَ اِلٰي يَوْمِ الْقِيٰمَةِ ۭ كُلَّمَآ اَوْقَدُوْا نَارًا لِّلْحَرْبِ اَطْفَاَهَا اللّٰهُ ۙ وَيَسْعَوْنَ فِي الْاَرْضِ فَسَادًا ۭ وَاللّٰهُ لَا يُحِبُّ الْمُفْسِدِيْنَ ۝٦٤

**आणि यहूद्यांनी सांगितले की, अल्लाहतआलाचे हात (आजकाल) तंग आहेत[२]; त्यांचेच हात तंग आहेत, आणि त्यांचे असे म्हणण्यामुळे त्यांना (अल्लाहतआलाने) शापित करून टाकले; किंबहुना अल्लाहतआलाचे दोन्ही हात सढळ आहेत (तो) जसे इच्छितो, तसा खर्च करतो; आणि जे काही तुझ्याकडे तुझ्या पालनकर्त्याकडून उतारले जात आहे, ते तर यांच्यातून बहुतेकांच्या शिरजोरी आणि 'कुफ्र' मध्ये वृद्धी करून देते. आणि आम्ही त्यांच्या आपसांतच कयामतपर्यंत शत्रुत्व आणि द्वेष टाकून दिला आहे.ते जेव्हा कुण्या युद्धाची आग भडकवूं इच्छितात, तर अल्लाहतआला तिला विझवून टाकतो[३]. आणि ते मुलुखात फसाद माजवित फिरतात[४]. आणि अल्लाहतआला फसाद करणाऱ्यांशी प्रेम करीत नाही ६४**

१) ही धर्मपंडित आणि धर्मातील श्रेष्ठ आणि सदाचरणी सेवकांची कानउघाडणी आहे, की जनतेतील बहुसंख्य लोक तुमच्यासमोर वाईट आणि अपराधी कृत्ये आणि हरामखोरी करतात; परंतु तुम्ही त्यांना मना करीत नाही. अशा परिस्थितीत तुमचे हे मुक रहाणे, फार मोठा अपराध आहे. याने स्पष्ट होते की, भलाईचा हुकूम करणे आणि वाईट गोष्टींना मना करणे, याचे किती महत्त्व आहे. आणि असे न करण्यावर किती कडक तंबीही आहे. जसे की, हदीसीमध्ये सुद्धा हा विषय विस्ताराने आणि अनेकदा वर्णन करण्यांत आला आहे.

२) ही तीच गोष्ट आहे, जी सू.आले इम्रान महावाक्य क्र.१८१ मध्ये सांगितली गेली आहे; की जेव्हा अल्लाहतआलाने आपल्या मार्गात खर्च करण्याचे आवाहन केले आणि त्याला चांगल्या कर्जाने संबोधित केले; तेव्हा या यहूद्यांनी म्हटले की,''अल्लाहतआला तर फकीर आहे'' लोकांजवळ कर्ज मागत आहे. आणि ते युक्तीच्या प्रयोजनाला समजूंशकले नाहीत, जे यांत गर्भित होते. म्हणजे सर्व काही अल्लाहचे दिलेले आहे. आणि अल्लाहच्या दिलेल्या संपत्तीतून, काही अल्लाहच्या मार्गात खर्च करणे, काही कर्ज नाही. परंतु ही त्याची कृपेची पराकाष्टा आहे की, तो यावर मोठे प्रतिफळ देतो. येथपावेतो की, एक एक दाण्याला, सात सातशे दाण्यांपर्यंत वाढवून देतो आणि त्याला चांगल्या कर्जाने यासाठी संबोधित केले, की जेवढा तुम्ही खर्च कराल, त्याच्या कितीतरी पटीने जास्त तुम्हाला परत करील. 'मगलुला' चा अर्थ 'बखीला' (कंजुषी करणारे) केला गेला आहे. म्हणजे यहूद्यांचा उद्देश असा नव्हता की, अल्लाहतआलाचे हात वास्तविक बांधलेले आहेत. परंतु त्यांचा उद्देश हा होता की, त्याने आपले हात खर्च करण्यापासून आवरले आहेत (इब्ने कसीर) अल्लाहतआलाने म्हटले, हात तर त्यांचेच बांधलेले आहेत. म्हणजे कंजुषी करणे हीच त्यांची सवय आहे. अल्लाहतआलाचे दोन्ही हात मोकळे असतात. जो जसा इच्छितो, तसा खर्च करतो. त्याची कृपा सर्वव्यापी आहे, आणि तो सर्वांना देतो. सर्व खजिने त्याच्याच जवळ आहेत. तसेच त्याने आपल्या निर्मितीसाठी सर्व इच्छा आणि गरजांचा बंदोबस्त केलेला आहे. आम्हाला दिवसां किंवा रात्री प्रवासात आणि मुक्कामांच्या जागी आणि दुसऱ्या सर्व स्थितीमध्ये ज्या ज्या गोष्टींची जरूरी पडते किंवा पडू शकते, तोच सर्व पुरवितो. ''तुम्ही जे काही त्याच्याजवळ मागितले, त्याने तुम्हास दिले. अल्लाहच्या देणग्या इतक्या आहेत की, तुम्ही मोजू शकत नाही; मनुष्यच फार नादान आणि कृतघ्न आहे'' (सू.इब्राहीम-३४) हदीसमध्ये सुद्धा आहे, नबी ﷺ नी फर्माविले, ''अल्लाहचा उजवा हात भरलेला आहे, रात्रंदिवस खर्च करीत असतो. परंतु काहीच कमी होत नाही. जरा पहा तर खरे ! जेव्हापासून त्याने आकाश आणि पृथ्वी निर्माण केली आहेत, तो खर्च करीत आहे. परंतु त्याच्या हाताच्या खजिन्यांत कमी आलेली नाही. (स. बुखारी व स. मुस्लीम)

३) म्हणजे हे जेव्हा कधीपण, आपल्या विरूद्ध कारस्थान करतात किंवा युद्धाची सामग्री प्राप्त करीतात; तेव्हा अल्लाहतआला त्याला निरर्थक करून टाकतो. आणि त्यांच्या कारस्थानांना त्यांच्यावरच उलटवून टाकतो. आणि त्यांना, ''जो दुसऱ्यासाठी खड्डा खणतो तोच त्याच्यात पडतो.'' सारखी परिस्थिती निर्माण करून देतो.

४) त्यांची दुसरी सवय ही आहे की, नेहमी मुलुखात फसाद पसरविण्याचा प्रयत्न करतात. वास्तविक पाहतां, अल्लाहतआला फसाद करणाऱ्यांना पसंत करीत नाही.

وَلَوْ أَنَّ أَهْلَ الْكِتَابِ آمَنُوا وَاتَّقَوْا لَكَفَّرْنَا عَنْهُمْ سَيِّئَاتِهِمْ وَلَأَدْخَلْنَاهُمْ جَنَّاتِ النَّعِيمِ ﴿٦٥﴾

आणि जर हे ग्रंथधारी लोक ईमान आणते, आणि ईशभय बाळगते[१], तर आम्ही त्यांचे सर्व अपराध क्षमा करून टाकले असते, आणि अवश्य त्यांना सुख शांतीच्या स्वर्गात घेऊन गेलो असतो ६५

وَلَوْ أَنَّهُمْ أَقَامُوا التَّوْرَاةَ وَالْإِنْجِيلَ وَمَا أُنْزِلَ إِلَيْهِمْ مِنْ رَبِّهِمْ لَأَكَلُوا مِنْ فَوْقِهِمْ وَمِنْ تَحْتِ أَرْجُلِهِمْ ۚ مِنْهُمْ أُمَّةٌ مُقْتَصِدَةٌ ۖ وَكَثِيرٌ مِنْهُمْ سَاءَ مَا يَعْمَلُونَ ﴿٦٦﴾

आणि जर हे लोक तौरात आणि इंजिल आणि त्यांच्याकडे जे काही अल्लाहतआलाकडून अवतरीत करण्यांत आले आहे त्यावर ते कायम राहिले असते[२] तर या लोकांना आपल्या वरून आणि खालून रोजी (अन्न) मिळाली असती आणि खाल्ले[३] असते. एक समूह तर त्यांच्यातून मध्यम मार्गी आहे; बाकी यांच्यातून बहुतेक लोकांची फार वाईट कर्मे आहेत[४] ६६

يَا أَيُّهَا الرَّسُولُ بَلِّغْ مَا أُنْزِلَ إِلَيْكَ مِنْ رَبِّكَ ۖ وَإِنْ لَمْ تَفْعَلْ فَمَا بَلَّغْتَ رِسَالَتَهُ ۚ وَاللَّهُ يَعْصِمُكَ مِنَ النَّاسِ ۗ إِنَّ اللَّهَ لَا يَهْدِي الْقَوْمَ الْكَافِرِينَ ﴿٦٧﴾

हे पैगंबरा! जे काही आपल्याकडे आपल्या पालनकर्त्याकडून अवतरीत करण्यांत आले आहे, ते (लोकांना) पोहचवूंन द्या. जर आपण असे केले नाही, तर आपण अल्लाहची पैगंबरी अदा केली नाही[५]. आणि आपणांस अल्लाहतआला लोकांपासून वाचवूंन घेईल[६]. नि:संशय अल्लाहतआला काफिरांना मार्गदर्शन करीत नसतो ६७

قُلْ يَا أَهْلَ الْكِتَابِ لَسْتُمْ عَلَىٰ شَيْءٍ حَتَّىٰ تُقِيمُوا التَّوْرَاةَ وَالْإِنْجِيلَ وَمَا أُنْزِلَ إِلَيْكُمْ مِنْ رَبِّكُمْ ۗ وَلَيَزِيدَنَّ كَثِيرًا مِنْهُمْ مَا أُنْزِلَ إِلَيْكَ مِنْ رَبِّكَ طُغْيَانًا وَكُفْرًا ۖ فَلَا تَأْسَ عَلَى الْقَوْمِ الْكَافِرِينَ ﴿٦٨﴾

आपण सांगून टाका की, अहो ग्रंथधारी लोकांनो! तुम्ही वास्तविक कुठल्याच गोष्टीवर नाहीत, जोपर्यंत तौरात आणि इंजीलवर आणि जे काही तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून अवतरीत करण्यांत आले आहे, त्यावर कायम न होऊन जाल.जे काही आपल्याकडे आपल्या पालनकर्त्यांकडून उतरले आहे, ते त्यांच्यातून बहुतेकांच्या खोडसळपणांत आणि नाकारण्यांत आणखी वृद्धीच करेल[७]; म्हणून आपण या काफिरांकडून दु:खी होऊ नका ६८

إِنَّ الَّذِينَ آمَنُوا وَالَّذِينَ هَادُوا وَالصَّابِئُونَ وَالنَّصَارَىٰ مَنْ آمَنَ بِاللَّهِ وَالْيَوْمِ الْآخِرِ وَعَمِلَ صَالِحًا فَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُونَ ﴿٦٩﴾

नि:संशय, ज्यांनी ईमान आणले आणि जे यहूदी, नक्षत्रपुजक आणि ख्रिस्ती यापैकी जो कोणी अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसांवर ईमान आणेल, आणि चांगली कामे करीन, त्याला कुठल्याही प्रकारची भीती राहणार नाही. आणि त्याला कुठल्याही प्रकारचे दु:ख होणार नाही[८] ६९

لَقَدْ أَخَذْنَا مِيثَاقَ بَنِي إِسْرَائِيلَ وَأَرْسَلْنَا إِلَيْهِمْ رُسُلًا ۖ كُلَّمَا جَاءَهُمْ رَسُولٌ بِمَا لَا تَهْوَىٰ أَنْفُسُهُمْ فَرِيقًا كَذَّبُوا وَفَرِيقًا يَقْتُلُونَ ﴿٧٠﴾

आम्ही खचितच् बनु इस्राईल कडून (पक्के) वचन घेतले; आणि त्यांच्याकडे पैगंबरांना पाठविले, जेव्हा कधी पैगंबर त्यांच्याकडे ते आदेश घेऊन आले, जे त्यांच्या मर्जीच्या विरूद्ध होते, तर त्यांनी त्यातील एका समूहाला तर खोटे ठरवले आणि एका समूहाला ठार केले ७०

१) म्हणजे ते ईमान जे अल्लाहतआलाला पाहिजे आहे; यांच्यात सर्वांत महत्त्वाचे मोहम्मद ﷺ वर ईमान आणणे आहे. जसा की, त्यांच्यावर अवतरीत झालेल्या पुस्तकांत सुद्धा त्यांना याचा आदेश देण्यात आला आहे. 'वत्तकौ ' आणि अल्लाहच्या नाराजीपासून वाचत रहावे. यात सर्वात महत्त्वाचे ते 'शिर्क' आहे, ज्यात ते व्यस्त आहेत आणि तो मत्सर आहे, जो शेवटच्या पैगंबराबरोबर ते बाळगून आहेत.

२) तौरात आणि इंजीलवर कायम रहाण्याचा अर्थ, त्यांच्या त्या आदेशांचे अनुपालन आहे, जे त्यांत त्यांना देण्यांत आले आणि त्यांच्यातूनच एक आदेश शेवटच्या पैगंबरावर ईमान आणणे पण होता. आणि 'वमा उन्जेला' ने अभिप्रेत सर्व आकाशी ग्रंथावर ईमान आणणे पण आहे, ज्यात कुरआन करीम पण समाविष्ट आहे. अर्थ असा की, त्यांनी इस्लाम कबूल करून घेतला असता.

३) वर खालीचा उल्लेख अतिशयोक्ती म्हणून आहे; म्हणजे भरपूर आणि अनेक प्रकारची रोजी, अल्लाहतआला प्राप्त करून देईल किंवा 'वर' ने अभिप्रेत आकाश म्हणजे आवश्यकतेनुसार खूप पाऊस पडतो आणि 'खाली' ने

अभिप्रेत जमीन आहे. म्हणजे जमीन या पावसाला आपल्यांत शोषून घेऊन, खूप उत्पन्न देते. यामुळे सुखसमृद्धीचा काळ सुंरू होऊन जातो. ज्याप्रमाणे एका दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जर या वस्तीवाले ईमान आणते आणि जर त्यांनी ईशभय बाळगले असते, तर आम्ही त्यांच्यावर आकाश आणि पृथ्वीचे बरकतीचे दरवाजे उघडून दिले असते (सू. अअराफ-९६)

४) परंतु यांच्या बहुसंख्येने ईमानाचा मार्ग चोखळला नाही. आणि ते 'कुफ्र' वर कायम आणि मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीला नाकारण्यावर अडून बसले आहेत. याच दुराग्रहाला आणि नाकारण्याला, येथे वाईट कृत्यांनी संबोधित केले आहे. मध्यम मार्गाच्या एक समूहाने येथे अभिप्रेत अब्दुल्लाह बिन सलाम सारखी ८/९ माणसे, जी मदीनेच्या यहूद्यांतून मुसलमान झालीत ती आहेत.

५) या हुकूमाचा मतितार्थ असा आहे की, जे काही आपणांवर ﷺ अवतरीत करण्यांत आले आहे, ते कमी जास्त केल्याशिवाय आणि लोकांच्या निंदेची पर्वा केल्याशिवाय आपण ﷺ नी लोकांपर्यंत पोहचवूंन द्यावे. आपण ﷺ नी असेच केले. ह.आयेशा ﷺ असे म्हणतात की, ''जो मनुष्य असा गुमान करेल की, नबी ﷺ नी, काही लपवून ठेवले, त्याने खचितच् खोटे सांगितले'' (स.बुखारी-स. मुस्लीम) आणि जेव्हा ह.अली ﷺ ला विचारले गेले की, तुमच्याजवळ कुरआनाव्यतिरिक्त वहय मार्फत अवतरीत झालेली काही गोष्ट आहे? तर त्यांनी शपथ खाऊन नकार दिला आणि सांगितले, ''तथापि कुरआनाची समज आहे, ज्याला अल्लाहतआला कोणालाही देईल.'' (स.बुखारी क्र.६९-३) आणि निरोपाच्या हज्जच्या प्रसंगी आपण ﷺ नी सहाबाच्या एक लाख किंवा एख लाख चाळीस हजारच्या मोठ्या मेळाव्यापुढे सांगितले,''तुम्ही माझ्या बाबतीत काय सांगाल? त्यांनी सांगितले, ''आम्ही साक्ष देऊं की आपण ﷺ नी अल्लाहचा संदेश पोहचवूंन दिला. आणि त्याचा हक्क अदा करून दिला आणि सर्वांचे भले इच्छिले.'' आपण ﷺ नी आकाशाकडे बोटाने इशारा करीत म्हटले, ''अल्लाहुम्मा हल बल्लगतु (तीन वेळा) अल्लाहुम्मा फशहद् (तीन वेळा) (स.मुस्लीम) नबी ﷺ म्हणले ''हे अल्लाह! मी तुझा संदेश पोहचवून दिला तू साक्षी रहा, तू साक्षी रहा, तू साक्षी रहा!''

६) हे संरक्षण अल्लाहतआलाने चमत्काराने युक्त अशा पद्धतीने पण केले. आणि ऐहिक पद्धतीने पण केले. या महावाक्याच्या अवतरणाच्या फार पूर्वी अल्लाहतआलाने प्रथम आपण ﷺ चे काका अबुतालीब यांच्या मनात आपले ﷺ चे हार्दीक प्रेम टाकून दिले. आणि ते आपले संरक्षण करीत राहिले. त्यांचे 'कुफ्र' वर कायम राहणे पण त्याच सबबीचा एक भाग वाटतो; कारण की जर ते मुसलमान होऊन गेले असते, तर कुरैश सरदारांच्या मनांत, त्यांची दहशत व श्रेष्ठत्व राहिले नसते, जे त्यांच्या समधर्मामुळे शेवटपर्यंत राहिले. मग त्यांच्या मृत्यूनंतर अल्लाहतआलाने काही कुरैशी सरदारांमार्फत, मग मदीनेच्या अन्सारांमार्फत आपले संरक्षण केले. मग जेव्हा हे महावाक्य अवतरीत झाले, तेव्हा आपण ﷺ नी संरक्षणाची साधने (पहारे वगैरे) काढून टाकले. यानंतर कित्येकदा अतिभयंकर धोक्याचा सामना करावा लागला; परंतु अल्लाहतआलाने आपले संरक्षण केले. यानुसार वह्यच्या मार्फत वेळोवेळी यहूद्यांच्या कारस्थानांपासून सावध करून धोक्याच्यावेळी वाचविले. आणि घनघोर युद्धाच्या वेळी, काफिरांच्या फारच धोक्याच्या हल्ल्यांपासून पण संरक्षण केले.

७) हे मार्गदर्शन आणि पथभ्रष्ट होणे, या तत्त्वाप्रमाणे आहे, जी अल्लाहची सुन्नत राहिली आहे; म्हणजे ज्याप्रमाणे काही कर्म आणि वस्तूंनी, ईमानवाल्यांना ईमान आणि मान्यता, चांगली कामे आणि फायदा पोहचवणारे ज्ञान यांच्यात वाढ होते. त्याचप्रमाणे पाप आणि आज्ञाभंजनाने कुफ्र आणि नाकारण्यांत (मोठी) वाढ होते. या विषयाला अल्लाहतआलाने कुरआन करीममध्ये अनेक ठिकाणी वर्णन केले आहे. उदाहरणार्थ, ''आपण सांगून टाका हे कुरआन ईमानवाल्यांसाठी मार्गदर्शन आणि आरोग्यदायी आहे; आणि जे लोक ईमान आणत नाही, त्यांच्या कानांत बहिरेपणा आहे; आणि हे त्यांच्यासाठी आंधळेपणा कारणीभूत आहे. बहिरेपणामुळे, त्यांना जणूं दूर अंतरावरून साद घातली जात आहे.'' (सू. हा मीम सजदा-४४) ''आणि आम्ही कुरआनच्या मार्फत, ती गोष्ट अवतरीत करीतो, जी ईमानवाल्यांसाठी शिफा (रोगांतून बरे होणे) आणि दया आहे; आणि अत्याचाऱ्यांसाठी तर यांच्यांत नुकसानच वाढत जाते.'' (सू. बनी इस्राईल-८२)

८) हा तोच विषय आहे, जो सू.बकर: च्या महावाक्य क्र.६२ मध्ये वर्णन करण्यात आला आहे. त्याला पाहून घ्यावे.

وَحَسِبُوٓا اَلَّا تَكُوْنَ فِتْنَةٌ فَعَمُوْا وَ صَمُّوْا ثُمَّ
تَابَ اللّٰهُ عَلَيْهِمْ ثُمَّ عَمُوْا وَصَمُّوْا كَثِيْرٌ مِّنْهُمْ ؕ
وَ اللّٰهُ بَصِيْرٌۢ بِمَا يَعْمَلُوْنَ ﴿٧١﴾

आणि समजूत करून घेतली की, काही शिक्षा होणार नाही. बस आंधळे आणि बहिरे होऊन बसले. मग अल्लाहतआलाने त्यांच्याकडे पश्चात्ताप मान्ये केले; याच्यानंतर सुद्धा यांच्यातून बहुतेक आंधळे आणि बहिरे होऊन गेले[१]. अल्लाहतआला त्यांच्या कर्मांना चांगल्याप्रकारे पहात आहे (७१)

لَقَدْ كَفَرَ الَّذِيْنَ قَالُوْٓا اِنَّ اللّٰهَ هُوَ الْمَسِيْحُ ابْنُ
مَرْيَمَ ؕ وَقَالَ الْمَسِيْحُ يٰبَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ اعْبُدُوا
اللّٰهَ رَبِّيْ وَرَبَّكُمْ ؕ اِنَّهٗ مَنْ يُّشْرِكْ بِاللّٰهِ فَقَدْ
حَرَّمَ اللّٰهُ عَلَيْهِ الْجَنَّةَ وَمَاْوٰىهُ النَّارُ ؕ وَمَا لِلظّٰلِمِيْنَ
مِنْ اَنْصَارٍ ﴿٧٢﴾

नि:संशय ते लोक काफिर होऊन गेले, ज्यांचे म्हणणे आहे की, मसीह इब्ने मर्यमच अल्लाह् आहे[२]. वास्तविक स्वत: मसीहने त्यांना सांगितले होते की, हे बनी इस्राईलांनो! अल्लाहचीच उपासना करा, जो माझा आणि तुमचा सर्वांचा पालनकर्ता आहे[३]; विश्वास ठेवा की, जो मनुष्य अल्लाहच्या बरोबर सरकतदार ठरवितो, अल्लाहतआलाने त्याच्यासाठी स्वर्ग हराम केला आहे.त्याचे ठिकाण नरकाग्नीच आहे; आणि गुन्हेगारांची मदत करणारा कोणी असणार नाही[४] (७२)

لَقَدْ كَفَرَ الَّذِيْنَ قَالُوْٓا اِنَّ اللّٰهَ ثَالِثُ
ثَلٰثَةٍ ۘ وَمَا مِنْ اِلٰهٍ اِلَّآ اِلٰهٌ وَّاحِدٌ ؕ وَاِنْ
لَّمْ يَنْتَهُوْا عَمَّا يَقُوْلُوْنَ لَيَمَسَّنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا
مِنْهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٧٣﴾

ते लोक पण नि:संशय काफिर होऊन गेले, ज्यांनी म्हटले अल्लाह तीन मधला तिसरा आहे[५]; वास्तविक अल्लाहतआलाशिवाय कोणी उपास्य नाही. जर हे लोक आपल्या या म्हणण्यापासून परावृत्त झाले नाहीत, तर यांच्यातून जे कुफ्रवर राहतील, त्यांना यातनादायक शिक्षा जरूर पोहचतील (७३)

१) म्हणजे असे समजत होते की, काही शिक्षा दिली जाणार नाही; परंतु अल्लाहच्या उल्लेखित तत्वाप्रमाणे ही शिक्षा देण्यांत आली; की हे सत्याला पाहण्याला निव्वळ आंधळे आणि सत्याला ऐकण्याला निव्वळ बहिरे होऊन गेलेत आणि पश्चात्ताप व्यक्त केल्यानंतर याच कर्मांची त्यांनी पुनरावृत्ती केली आहे. तर त्याची तीच शिक्षा सुद्धा दुसऱ्यांदा देण्यांत आली.

२) हाच विषय आ.क्र.१७ मध्येपण येऊन चुकला. येथे ग्रंथधारी लोकांच्या पथभ्रष्टतेच्या वर्णनांत, याचे पुन्हा वर्णन केले. यांत त्यांच्या त्या पंथाच्या 'कुफ्र' चे प्रदर्शन आहे, जो ह.मसीह عليه السلام ला अल्लाह होण्याचे म्हणणारा आहे.

३) म्हणून ह.ईसा म्हणजे मसीह इब्ने मर्यम عليه السلام नी जेव्हा ते स्तनपानच्या काळात (अल्लाहतआलाच्या हुकूमाने, जेव्हा की या वयांत मुले बोलण्याची ताकद बाळगत नाहीत) सर्वप्रथम आपल्या तोंडाने आपल्या उपासक होण्याला जाहीर केले. ''मी अल्लाहचा बंदा आणि त्याचा पैगंबर आहे. त्याने मला पुस्तक पण दिले आहे.'' (सू. मर्यम-३०) ह.मसीह عليه السلام नी हे सांगितले नाही की, मी अल्लाह आहे किंवा अल्लाहचा पुत्र आहे. फक्त हे सांगितले की मी अल्लाहचा उपासक आहे. आणि प्रौढावस्थेत सुद्धा त्यांनी हेच आमंत्रण दिले.''नि:संशय अल्लाह माझा आणि तुमचा पालनकर्ता आहे. त्याचीच उपासना करा की, हाच सरळमार्ग आहे'' (सू. आले इमरान-५१) हे तेच शब्द आहेत जे आईच्या कुशीत पण सांगितले होते (पहा सू.मर्यम -३६) आणि जेव्हा कयामतच्या जवळपास त्यांचे आकाशांतून अवतरण होईल, ज्याची बातमी खऱ्या हदीसीमध्ये देण्यांत आली आहे; आणि ज्यावर अहले सुन्नतचे एकमत आहे; तेव्हा सुद्धा ते नबी ﷺ च्या शिक्षणाप्रमाणे लोकांना अल्लाहच्या एक होण्याकडे आणि त्याच्या आज्ञापालनाकडेच, बोलावतील आपल्या उपासनेकडे कदापि नाही.

४) ह.मसीह عليه السلام नी आपल्या उपासक होण्याचे आणि पैगंबर होण्याचे प्रदर्शन अल्लाहच्या हुकूमाने आणि मर्जीने त्यावेळी सुद्धा केले होते, ज्यावेळी ते आईच्या कुशीत म्हणजे स्तनपान करण्याच्या अवस्थेत होते. मग प्रौढावस्थेत हे जाहीर केले. आणि त्याचबरोबर 'शिर्क' च्या घाणीपासून व खराबीपासून वाचण्याचे वर्णन पण करून दिले की, 'शिर्क' करणाऱ्यांवर स्वर्ग हराम आहे. आणि त्याचा कोणी मददगार पण होणार नाही; जो त्याला नरकाग्नीतून काढून आणेन, जसे की शिर्क करणारे समजतात.

५) हा खिस्त्यांच्या दुसऱ्या पंथाचा उल्लेख आहे. जे तीन परमेश्वराची धारणा बाळगतात. ज्याला ते 'अकानीमे सलासा' (म्हणजे मूळ तीन) म्हणतात. त्यांच्या खुलाश्यामध्ये जरी त्यांच्या आपसांत मतभेद असला, तरी खरी गोष्ट हीच आहे की, अल्लाहबरोबर त्यांनी ह.ईसा عليه السلام आणि त्यांच्या मातोश्री ह.मर्यमला पण उपास्य ठरविले आहे. जसे की, कुरआनाने स्पष्ट केले आहे. अल्लाहतआला कयामतच्या दिवशी ह.ईसा عليه السلام ला विचारेन, ''काय तूं लोकांना सांगितले होतेस की मला आणि माझ्या आईला, अल्लाहशिवाय उपास्य बनवूंन घ्यावे?'' (सू.माइद : ११६) यावरून हे ठाऊक झाले की, खिस्त्यांनी ह.ईसा عليه السلام आणि ह. मर्यम या दोघांना उपास्य बनवूंन घेतले आणि अल्लाह तिसरा उपास्य झाला. जो तीनमध्ये तिसरा म्हणविला गेला. पहिल्या श्रद्धेप्रमाणे अल्लाहतआलाने याला 'कुफ्र' ठरविले.

اَفَلَا يَتُوْبُوْنَ اِلَى اللّٰهِ وَ يَسْتَغْفِرُوْنَهٗ ؕ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٧٤﴾

हे लोक का अल्लाहतआलाकडे पश्चात्ताप करीत नाही, आणि क्षमा मागीत नाही? अल्लाहतआला तर फारच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ७४

مَا الْمَسِيْحُ ابْنُ مَرْيَمَ اِلَّا رَسُوْلٌ ۚ قَدْ خَلَتْ مِنْ قَبْلِهِ الرُّسُلُ ؕ وَ اُمُّهٗ صِدِّيْقَةٌ ؕ كَانَا يَاْكُلٰنِ الطَّعَامَ ؕ اُنْظُرْ كَيْفَ نُبَيِّنُ لَهُمُ الْاٰيٰتِ ثُمَّ انْظُرْ اَنّٰى يُؤْفَكُوْنَ ﴿٧٥﴾

मसीह इब्ने मर्यम पैगंबर असण्याशिवाय आणखी काही नाही. त्याच्या पूर्वीपण आणखी कित्येक पैगंबर होऊन चुकले आहेत. त्याची आई एक सात्विक बाई होती[१]. दोन्ही मातापुत्र जेवण करीत असत[२]. आपण बघा की कशाप्रकारे आम्ही त्यांच्यासमोर प्रमाणे ठेवत आहोत व नंतरही पहा की, हे लोक कोठे उलट भटकत चालले जात आहेत ७५

قُلْ اَتَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ مَا لَا يَمْلِكُ لَكُمْ ضَرًّا وَّلَا نَفْعًا ؕ وَاللّٰهُ هُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٧٦﴾

आपण सांगून टाका, काय तुम्ही अल्लाहशिवाय त्यांची उपासना करतात, जे न तुमच्या नुकसानीचे मालक आहेत, न कोण्या नफ्याचे. अल्लाहच असा आहे की, तो सर्वांचे ऐकतो आणि सर्व काही जाणतो[३] ७६

قُلْ يٰۤاَهْلَ الْكِتٰبِ لَا تَغْلُوْا فِیْ دِيْنِكُمْ غَيْرَ الْحَقِّ وَلَا تَتَّبِعُوْۤا اَهْوَآءَ قَوْمٍ قَدْ ضَلُّوْا مِنْ قَبْلُ وَ اَضَلُّوْا كَثِيْرًا وَّ ضَلُّوْا عَنْ سَوَآءِ السَّبِيْلِ ﴿٧٧﴾

आपण सांगून टाका की, अहो ग्रंथधारी लोकांनो! आपल्या धर्मांत नाहक अतिशयोक्ती करू नका[४]. आणि त्या लोकांच्या मनेच्छांचे अनुकरण करू नका, जे पहिलेच बहकून गेले आहेत. आणि पुष्कळांना बहकवून पण चुकले आहेत[५]. आणि सरळ मार्गाहून भटकून गेले आहेत ७७

१) 'सिद्दीका' चा अर्थ ईमानवाली आणि सात्विक असा आहे. म्हणजे तीपण ह.मसीह عليه السلام वर ईमान आणणाऱ्यांमध्ये आणि त्यांना मान्यता देणाऱ्यांमध्ये होती. याचा अर्थ हा आहे की, ती पैगंबर नव्हती. जसा की काही लोकांना आभास झाला आहे. आणि त्यांनी ह. मर्यम सह ह.सारा (ह.इस्हाक عليه السلام ची आई) ह.मूसा عليه السلام च्या आईला पैगंबर ठरविले आहे. यासाठी त्यांनी या गोष्टीचा आधार घेतला आहे की, या दोघींशी देवदूतांनी येऊन संभाषण केले. आणि ह.मूसा عليه السلام च्या आईला स्वत: अल्लाहतआलाने 'वह्य' केले. हे संभाषण आणि 'वह्य' पैगंबरीचे प्रमाण आहे. परंतु बहुसंख्य धर्मपंडितांजवळ, हे प्रमाण असे नाही, जे कुरआनाच्या स्पष्ट अर्थाच्या महावाक्यांशी मुकाबला करूंशकेन. कुरआनाने स्पष्ट केले आहे की, आम्ही जेवढेपण पैगंबर पाठविले ते पुरूष होते. (सू.यूसुफ-१०९)

२) हे ह.मसीह عليه السلام आणि ह.मर्यम च्या उपास्य होण्याचे खंडन आणि मानव होण्याचे प्रमाण आहे. कारण की खाणे पिणे हे मानवांच्या आवश्यक गोष्टींमधून आहे. जो उपास्य असेल, तो या गोष्टींपासून निरपेक्ष किंबहुना फारच दूर असतो.

३) हे शिर्क करणाऱ्यांच्या बुद्धीहिनतेचे स्पष्टीकरण करण्यांत येत आहे; की, त्यांनी अशांना उपास्य बनवूंन ठेवले आहे, जे कोणाला फायदा पोहचवूंशकत नाही. आणि नुकसान पण पोचहवूंशकत नाही. किंबहुना नफा नुकसान पोहचविणे तर दूरच राहिले, ते तर कोणाची गोष्ट ऐकणे आणि कोणाची स्थिती जाणून घेण्याचे सामर्थ्य बाळगीत नाही. हे सामर्थ्य तर फक्त अल्लाहतच आहे. यासाठी इच्छापूर्ती करणारा, संकट दूर करणारा पण फक्त तोच आहे.

४) म्हणजे सत्याच्या पालनामध्ये मर्यादेचे उल्लंघन करू नका. आणि ज्यांच्या सन्मानाचा हुकूम देण्यात आला आहे, त्यांच्यात अतिशयोक्ती करून, पैगंबरीच्या पदावरून उचलून उपास्यांच्या पदावर बसवू नका. जसे तुम्ही ह.मसीह عليه السلام च्या बाबतीत केले. 'गुलू' (मर्यादेच्या पुढे नेणे) प्रत्येक काळांत 'शिर्क' आणि मार्गभ्रष्टतेचे सगळ्यात मोठे साधन राहिले आहे. माणसाची ज्यावर श्रद्धा आणि प्रेम असते, तो त्याच्या प्रशंसेमध्ये फार अतिशयोक्ती करतो. जर तो इमाम आणि धार्मिक अधिकारी असेल तर त्याला पैगंबरासारखे निष्पाप समजणे आणि पैगंबराला ईश्वरीय वैशिष्ट्यांनी युक्त समजणे ही सर्व साधारण गोष्ट झाली आहे. दुर्दैवाने मुसलमान सुद्धा या 'गुलू' पासून सुरक्षित राहू शकले नाहीत. त्यांनी काही इमामांच्या सन्मानांत पण 'गुलू' केला. आणि त्यांचे मत आणि म्हणणे येथपावेतो की, त्यांच्याकडे संबंधित (फतवा आणि फिका) धर्मशास्त्रीय हुकूम आणि धर्मशास्त्राचे ज्ञानाला पण रसूल ﷺ च्या हदीसीच्या तुलनेत प्राधान्य दिले. आणि त्यांच्यातूनच एक समूह नबी करीम ﷺ च्या सन्मानांत 'गुलू' करून त्यांना ''नुरून मिन नुरिल्लाह, आलिमी मा काना व मा यकून'' उपस्थित आणि पाहणारा (हाजीर व नाजीर) नफा आणि नुकसान पोहचवणारा (नाफेअ व जार) समजतो. किंबहुना थडग्यात पुरलेल्या पुष्कळशा कबरवाल्यांच्या आत सुद्धा तो विश्वात ढवळाढवळ करण्याचा अधिकार मान्य करीतो. आणि याचसाठी त्यांच्याशी दाद मागतो. याचप्रमाणे शिया लोक, ह.अली رضي الله عنه ला ईश्वरासारखे मानणारे आहेत.

५) म्हणजे आपल्या पूर्वीच्या लोकांच्या मागे लागू नका; जे एका पैगंबराला उपास्य बनवूंन स्वत: ही मार्गभ्रष्ट झालेत आणि दुसऱ्यांना पण मार्गभ्रष्ट केले.

لُعِنَ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ عَلٰى لِسَانِ دَاوٗدَ وَعِيْسَى ابْنِ مَرْيَمَ ؕ ذٰلِكَ بِمَا عَصَوْا وَّكَانُوْا يَعْتَدُوْنَ ﴿٧٨﴾

बनी इस्राईलच्या काफिरांवर (ह.) दाऊद (अ.) आणि (ह.) ईसा बिन मर्यम (अ.) च्या तोंडून शाप देण्यात आला[१]. या कारणाने की ते आज्ञाभंग करीत होते; आणि मर्यादेपुढे निघून जात[२] होते ७८

كَانُوْا لَا يَتَنَاهَوْنَ عَنْ مُّنْكَرٍ فَعَلُوْهُ ؕ لَبِئْسَ مَا كَانُوْا يَفْعَلُوْنَ ﴿٧٩﴾

आपसांत एक दुसऱ्यांना वाईट कामांपासून जे ते करीत असत, मना करीत नसत[३], जे काहीपण ते करीत असत, खचितच तेफार वाईट होते ७९

تَرٰى كَثِيْرًا مِّنْهُمْ يَتَوَلَّوْنَ الَّذِيْنَ كَفَرُوْا ؕ لَبِئْسَ مَا قَدَّمَتْ لَهُمْ اَنْفُسُهُمْ اَنْ سَخِطَ اللّٰهُ عَلَيْهِمْ وَفِي الْعَذَابِ هُمْ خٰلِدُوْنَ ﴿٨٠﴾

यांच्यातून बहुतेक लोकांना आपण पाहाल की, ते काफिरांशी मैत्री करतात; जे काही त्यांनी आपल्यासाठी पुढे पाठवून ठेवले आहे, ते फार वाईट आहे की, अल्लाहतआला त्यांचेवर नाराज झाला; आणि ते नेहमी शिक्षेत राहतील[४] ८०

وَلَوْ كَانُوْا يُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَالنَّبِيِّ وَمَآ اُنْزِلَ اِلَيْهِ مَا اتَّخَذُوْهُمْ اَوْلِيَآءَ وَلٰكِنَّ كَثِيْرًا مِّنْهُمْ فٰسِقُوْنَ ﴿٨١﴾

जर त्यांनी अल्लाहवर आणि नबी (सल्ल.) वर आणि जे अवतरीत केले गेले आहे त्यावर ईमान आणले असते तर हे काफिरांशी मैत्री न करते. परंतु यांच्यातून बहुतेक लोक आज्ञाभंजक आहेत[५] ८१

لَتَجِدَنَّ اَشَدَّ النَّاسِ عَدَاوَةً لِّلَّذِيْنَ اٰمَنُوا الْيَهُوْدَ وَالَّذِيْنَ اَشْرَكُوْا ۚ وَلَتَجِدَنَّ اَقْرَبَهُمْ مَّوَدَّةً لِّلَّذِيْنَ اٰمَنُوا الَّذِيْنَ قَالُوْٓا اِنَّا نَصٰرٰى ؕ ذٰلِكَ بِاَنَّ مِنْهُمْ قِسِّيْسِيْنَ وَرُهْبَانًا وَّاَنَّهُمْ لَا يَسْتَكْبِرُوْنَ ﴿٨٢﴾

खचितच् आपण ईमानवाल्यांचा सर्वात जास्त शत्रू यहूदी आणि मुशरिकांना पावाल[६]. आणि ईमानवाल्यांशी सर्वात जास्त मैत्रीच्या जवळ आपण खचितच् त्यांना पावाल, जे स्वत:ला खिस्ती म्हणवितात. हे यासाठी की, त्यांच्यात विद्वान आणि एकांतात राहणारे आहेत, आणि यासाठी की ते गर्व करीत नाहीत[७] ८२

१) म्हणजे ज़बूर मध्ये जे ह.दाऊद عليه السلام वर इंजील मध्ये जे ह.ईसा عليه السلام वर अवतरीत झालीत. आणि आता हाच शाप कुरआन करीमच्या मार्फत त्यांना देण्यांत येत आहे; जे ह.मुहम्मद ﷺ वर अवतरीत झाले. शापाचा अर्थ अल्लाहची दया आणि भलाईपासून वंचित होणे आहे.

२) ही शापाची कारणे आहेत

(अ.) अपराध म्हणजे जे करावयांस सांगितले ते न करणे, आणि जे निषीद्ध आहे ते करणे, असे करून त्यांनी अल्लाहचा आज्ञाभंग केला.

(ब) आणि 'एअतेदा' म्हणजे धर्मात मर्यादेबाहेर जाणे आणि नवीन गोष्टी शोधून, त्यांनी मर्यादेचे उल्लंघन केले. (गुलू आणि बिदअत)

३) यावर आणखी जास्त हे की, ते एक दुसऱ्याला वाईट गोष्टीपासून मना करीत नसत; जो स्वत:च एक मोठा अपराध आहे. काही भाष्यकारांनी याच वाईट कामांच्या मना न करण्याला, 'इसीयान' आणि मर्यादेबाहेर निघून जाणे (एअतेदा) ठरविले आहे; जे शापाला कारणीभूत झाले. हदीसमध्ये सुद्धा या अपराधावर मोठ्या कडक तंब्या देण्यात आल्या आहेत. एका हदीसमध्ये नबी ﷺ नी म्हटले, ''सगळ्यात पहिल्या प्रथम दोष जो बनी इस्राईलमध्ये घुसला, हा होता की, एक मनुष्य दुसऱ्या माणसाला वाईट कृत्य करतांना पाहत असे, तर म्हणे अल्लाहला भी आणि हे वाईट कृत्य सोडून दे. हे तुझ्यासाठी योग्य नाही. परंतु दुसऱ्या दिवशी, पुन्हा त्याचे बरोबर खाण्यापिण्यात आणि उठण्या बसण्यांत त्याला कुठलाही संकोच किंवा लाज वाटत नसे. (म्हणजे त्याच्या बरोबर जेवणारा त्याच्या बरोबर पिणारा, आणि सोबत उठबैस करणारा होऊन जात असे; वास्तविक ईमानाची मागणी त्याचा तिरस्कार आणि त्याच्याशी संबंध विच्छेद होता) ज्यावर अल्लाहतआलाने त्यांच्या आपसांत शत्रुत्व टाकून दिले. आणि ते अल्लाहकडून शापित केले गेले. मग सांगितले की, ''अल्लाहची शपथ ! तुम्ही अवश्य लोकांना चांगली कामे करण्याचा हुकूम करीत जा, आणि

वाईट कृत्यापासून मना करीत जा. अत्याचार करणाऱ्याचा हात धरून घेत जा. नाही तर तुमची स्थितीपण तशीच होईल. (अबु दाऊद) एका दुसऱ्या उल्लेखांत या कर्तव्याच्या पार न पाडण्यावर ही तंबी देण्यात आली आहे की, तुम्ही अल्लाहच्या शिक्षेला पात्र बनून जाल. मग तुम्ही अल्लाहजवळ दुआ जरी मागाल तरी ती कबूल होणार नाही. (मुसनद अहमद)

४) हा काफिरांशी मैत्री संबंधाचा परिणाम आहे; की अल्लाहतआला त्यांचेवर नाराज झाला आणि याच नाराजीचा परिणाम नरकाग्नीची कायमची शिक्षा आहे.

५) याचा अर्थ हा आहे की, ज्या मनुष्यांत खऱ्या अर्थाने ईमान असेल, तो काफिरांशी कधीही मैत्री करणार नाही.

६) यासाठी की, यहूद्यांमध्ये, श्रेष्ठत्वाची आणि द्वेषाची भावना, सत्यापासून तोंड फिरवणे आणि गर्व करणे आणि ज्ञानी आणि ईमानवाल्यांना कमी लेखण्याची भावना फार आढळून येते. हेच कारण आहे की, पैगंबरांना ठार मारणे आणि त्यांना खोटे ठरविणे त्यांचा छंद राहिला आहे; येथपावेतो की, त्यांनी रसूल ﷺ च्या खुनाचे सुद्धा कित्येक वेळा कारस्थान केले. आपण ﷺ वर जादूपण केली, आणि सर्व प्रकारे नुकसान पोहचविण्याचा सतत प्रयत्न केला आणि या मामल्यात बहुदेववाद्यांची स्थितीपण अशीच होती.

७) 'रूहबान' ने अभिप्रेत सात्विक, भक्तिसंपन्न आणि एकांतप्रिय लोक आणि 'किस्सीसीन' ने अभिप्रेत धर्मपंडित आणि उपदेशक आहेत; म्हणजे या खिस्त्यांमध्ये ज्ञान आणि विनम्रता आहे. म्हणून यांच्यात यहूद्यांप्रमाणे द्वेष आणि गर्व नाही. याशिवाय मसीह عليه السلام च्या धर्मात नम्रता, क्षमा करणे आणि लोकांचे अपराध विसरून जाणे, या शिक्षणाचे ठळक वैशिष्ट्ये आहे. येथपावेतो की, त्यांच्या पुस्तकात लिहिले आहे की, जर कोणी तुमच्या उजव्या गालावर मारेल, तर डावा गालपण त्याच्यापुढे करून द्या; म्हणजे भांडण करू नका. या कारणांनी ते, यहूद्यांच्या तुलनेत मुसलमानांच्या जास्त जवळ आहेत. खिस्त्यांचा हा उमदेपणा यहूद्यांच्या द्वेषाच्या मुकाबल्यात आहेत. तथापि जेथपर्यंत इस्लामच्या शत्रुत्वाचा संबंध आहे, कमी जास्तीच्या काही फरकासह इस्लामच्या विरूद्ध हा द्वेष खिस्त्यांमध्ये सुद्धा आढळून येतो. जसा की, खिश्चन आणि मुस्लमान यांच्यात शेकडो वर्षापासून मोर्चे बांधणी स्पष्ट आहे, आणि ज्याचा क्रम आजतागायत चालू आहे.  आणि इस्लामच्या विरोधांत यहूदी आणि खिस्ती दोन्ही मिळून कार्यरत आहेत. याचसाठी कुरआनाने दोघांशीही मैत्री करण्यात मना केले आहे.

وَإِذَا سَمِعُوا مَا أُنزِلَ إِلَى الرَّسُولِ تَرَىٰ أَعْيُنَهُمْ تَفِيضُ مِنَ الدَّمْعِ مِمَّا عَرَفُوا مِنَ الْحَقِّ ۖ يَقُولُونَ رَبَّنَا آمَنَّا فَاكْتُبْنَا مَعَ الشَّاهِدِينَ ﴿٨٣﴾

आणि जेव्हा ते पैगंबराकडे अवतरीत केलेल्या (वाणीला) ऐकतात; तेव्हा आपण त्यांचे डोळे अश्रूंनी डबडबीत झालेले पाहतात. या कारणाने की त्यांनी सत्याला ओळखून घेतले; ते म्हणतात की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही ईमान आणले. मग तू आम्हास पण, त्या लोकांबरोबर लिहून घे जे सत्य असल्याची हमी देतात (८३)

وَمَا لَنَا لَا نُؤْمِنُ بِاللَّهِ وَمَا جَاءَنَا مِنَ الْحَقِّ وَنَطْمَعُ أَن يُدْخِلَنَا رَبُّنَا مَعَ الْقَوْمِ الصَّالِحِينَ ﴿٨٤﴾

आणि आमच्याजवळ कोणते कारण आहे की, आम्ही अल्लाहतआलावर आणि जे सत्य आमच्यापर्यंत पोहचले आहे, त्याच्यावर ईमान आणू नये. आणि आम्ही या गोष्टीची आशा बाळगून आहोत की, आमचा पालनकर्ता आम्हास सात्विक लोकांच्या बरोबर दाखल करून देईल[१] (८४)

فَأَثَابَهُمُ اللَّهُ بِمَا قَالُوا جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ خَالِدِينَ فِيهَا ۚ وَذَٰلِكَ جَزَاءُ الْمُحْسِنِينَ ﴿٨٥﴾

यामुळे त्यांना अल्लाहतआला, यांना या म्हणण्यामुळे असे बाग देईल ज्यांच्या खालून (पाण्याचे) पाट वहात असतील, हे त्यांच्यात नित्य नेहमी राहतील. आणि सदाचरणी लोकांचा हाच मोबदला आहे (८५)

وَالَّذِينَ كَفَرُوا وَكَذَّبُوا بِآيَاتِنَا أُولَٰئِكَ أَصْحَابُ الْجَحِيمِ ﴿٨٦﴾

आणि जे लोक काफिर आहेत आणि आमच्या निशाण्यांना खोटे म्हणत राहिले, ते लोक नरकाग्नीवाले आहेत (८६)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تُحَرِّمُوا طَيِّبَاتِ مَا أَحَلَّ اللَّهُ لَكُمْ وَلَا تَعْتَدُوا ۚ إِنَّ اللَّهَ لَا يُحِبُّ الْمُعْتَدِينَ ﴿٨٧﴾

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहतआलाने ज्या चोख्या वस्तू तुमच्यासाठी हलाल केल्या आहेत, त्यांना हराम ठरवू नका[२]. आणि मर्यादांचे उल्लंघन करू नका. निःसंशय अल्लाहतआला मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्यांस पसंत करीत नसतो (८७)

وَكُلُوا مِمَّا رَزَقَكُمُ اللَّهُ حَلَالًا طَيِّبًا ۚ وَاتَّقُوا اللَّهَ الَّذِي أَنتُم بِهِ مُؤْمِنُونَ ﴿٨٨﴾

आणि अल्लाहतआलाने ज्या वस्तू तुम्हास दिल्या आहेत, त्यांतून हलाल मनपसंत वस्तू खा. आणि अल्लाहतआलाला भ्या, ज्याच्यावर तुम्ही ईमान ठेवतात (८८)

لَا يُؤَاخِذُكُمُ اللَّهُ بِاللَّغْوِ فِي أَيْمَانِكُمْ وَلَٰكِن يُؤَاخِذُكُم بِمَا عَقَّدتُّمُ الْأَيْمَانَ ۖ فَكَفَّارَتُهُ إِطْعَامُ عَشَرَةِ مَسَاكِينَ مِنْ أَوْسَطِ مَا تُطْعِمُونَ أَهْلِيكُمْ أَوْ كِسْوَتُهُمْ أَوْ تَحْرِيرُ رَقَبَةٍ ۖ فَمَن لَّمْ يَجِدْ فَصِيَامُ ثَلَاثَةِ أَيَّامٍ ۚ ذَٰلِكَ كَفَّارَةُ أَيْمَانِكُمْ إِذَا حَلَفْتُمْ ۚ وَاحْفَظُوا أَيْمَانَكُمْ ۚ كَذَٰلِكَ يُبَيِّنُ اللَّهُ لَكُمْ آيَاتِهِ لَعَلَّكُمْ تَشْكُرُونَ ﴿٨٩﴾

अल्लाहतआला तुमच्या शपथांतून निरर्थक शपथेवर तुमची पकड करणार नाही; परंतु पकड त्यावर करतो ज्या पक्क्या शपथा तुम्ही खाल[३], याचे प्रायश्चित्त दहा गरीबांना जेवण देणे आहे; सर्वसामान्य दर्जाचे जे आपल्या घरातील लोकांना तुम्ही खाऊ घालता[४]. किंवा त्यांना वस्त्रे देणे[५], किंवा एक गुलाम किंवा दासी मुक्त करणे.[६] आणि ज्याला सामर्थ्य नसेल, तर तीन दिवसाचे उपास आहेत[७]. हे तुमच्या शपथांचे प्रायश्चित्त आहेत; जेव्हा की तुम्ही शपथ खाऊन घ्याल, आणि आपल्या शपथांना लक्षात ठेवा! अशाचप्रकारे अल्लाहतआला तुमच्यासाठी आदेश वर्णन करीतो की, तुम्ही आभार मानावेत (८९)

१) हबशामध्ये (इथोपिया-द.आफ्रिका) जेथे मुसलमान मक्केच्या जीवन काळात दोनदा हिजरत (स्वदेश त्याग) करून गेले, तेथे नजाशीचे राज्य होते. हे खिस्ती राष्ट्र होते. हे महावाक्य हबशांत राहणाऱ्या खिस्त्यांच्याच बाबतीत अवतरीत झाले आहे. तथापि रिवायतीनुसार नबी ﷺ नी ह.अम्र बीन उमैय्या ज़मरी رضي الله عنه ला आपले पत्र देऊन नजाशीजवळ पाठविले होते. जे त्यांनी जाऊन त्याला ऐकविले. नजाशीने ते पत्र ऐकून हबशामध्ये असलेले हिजरत करून आलेले, आणि ह.जाफर बिन अबी तालीब رضي الله عنه ला आपल्याजवळ बोलाविले. आपले धर्मपंडित आणि धर्मउपदेशकांना गोळा करून घेतले. मग ह.जाफरला कुरआन करीम पढण्याचा हुकूम दिला. ह.जाफर رضي الله عنه नी सू.मर्यम वांचला, ज्यांत ह.ईसा عليه السلام च्या चमत्कारपूर्ण जन्माची आणि त्यांच्या अल्लाहचा सेवक आणि पैगंबर होण्याचा उल्लेख आहे. जे ऐकून त्यांच्यावर फारच परिणाम झाला, आणि डोळ्यातून अश्रू वाहू लागले. आणि त्यांनी ईमान आणले. काही म्हणतात की, नजाशीने आपले काही धर्मपंडित, नबी ﷺ जवळ पाठविले होते. जेव्हा आपण ﷺ नी त्यांना कुरआन वाचून ऐकविले, तर आपोआप त्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. आणि त्यांनी ईमान आणले. (फत्हुल कदीर) या महावाक्यांत कुरआन करीम ऐकून त्यांच्यावर जो परिणाम झाला, याचे चित्र रंगविण्यात आले आहे. आणि त्यांच्या ईमान आणण्याचा उल्लेख आहे. कुरआन करीममध्ये आणखी काही ठिकाणी अशा प्रकारच्या

ख्रिस्त्यांचा उल्लेख केला गेला आहे. ''खचितच् ग्रंथधारी लोकांमधून, काही असे लोक पण आहेत, जे अल्लाहवर आणि त्याच्या पुस्तकावर, जे तुमच्यावर अवतरीत झाले आहे, आणि जे त्यांच्यावर अवतरीत झाले आहे, ईमान ठेवतात. आणि अल्लाहसमोर विनम्रता दर्शवितात.'' (सू. आले इमरान-१९९) आणि हदीसमध्ये येते की, जेव्हा नजाशीच्या मृत्यूची बातमी, नबी ﷺ ला पोहचली, तेव्हा आपण ﷺ नी सहाबां ﷺ ना सांगितले की, हबशामध्ये तुमच्या भावाचा मृत्यू झाला आहे. त्याची नमाज पढा म्हणून आपण ﷺ नी एका वाळवंटात त्याची नमाजे जनाजा (गाइबाना) पढली. (सही बुखारी, स.मुस्लीम) आणखी एका हदीसमध्ये, अशा ग्रंथधारी लोकांबाबत, ज्यांनी नबी ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणले, दाखविण्यात आले आहे की, त्यांना दुप्पट मोबदला मिळेल. (स.बुखारी)

२) हदीसमध्ये येते, एक माणूस नबी ﷺ च्या सेवेत हजर झाला. आणि येऊन सांगितले हे रसूलुल्लाह ! जेव्हा मी मांस खातो तेव्हा माझ्या कामेच्छा भडकून उठतात, यासाठी मी माझ्या स्वत:वर मांस हराम करून घेतले आहे. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (स.तिर्मिझी, अल्बानी जिल्द-३ पृ.१४६) याचप्रमाणे अवतरणाच्या कारणाशिवाय दुसऱ्या रिवायतींनी सिद्ध आहे की, काही सहाबा ﷺ उपासनेसाठी काही हलाल गोष्टीतून (उदा.स्त्रीशी निकाह करणे, रात्रीच्या वेळी झोपणे, दिवसा खाण्या पिण्यापासून) स्वत:ला वाचवू इच्छित होते. नबी ﷺ ला जेव्हा हे समजले, तर आपण ﷺ नी त्यांना मना केले. ह.उस्मान बिन मजऊन ﷺ पण आपल्या पत्नीपासून अलिप्त राहू लागले होते. यांच्या पत्नीच्या तक्रारीवर आपण ﷺ नी त्यांनापण यापासून मना केले. (कुतुबे हदीस) सारांशः हे महावाक्य आणि हदीर्शींनी ठाऊक झाले की, अल्लाहने हलाल केलेल्या कोणत्याही वस्तूंला हराम करून घेणे, किंवा त्याच्यापासून असेच स्वत:ला वाचविणे योग्य नाही. मग जरी त्यांचा संबंध खाण्यापिण्याशी असो किंवा पोषाखाशी असो. किंवा आणखी मनपसंत आणि योग्य इच्छेशी असो.

मसला : अशाप्रकारे कोणी मनुष्य कोण्या वस्तूला आपल्यासाठी हराम करून घेईल तर ती हराम होणार नाही. फक्त स्त्रीशिवाय, तथापि या स्वरूपात काही धर्मपंडित असे म्हणतात की, शपथेचे प्रायश्चित्त घ्यावे लागेल आणि काहींजवळ प्रायश्चित आवश्यक नाही. इमाम शौकानी म्हणतात की, सही हदीर्शींनी याच गोष्टीचे समर्थन होते. कारण की, नबी ﷺ नी कोणालाही शपथेचे प्रायश्चित्त घेण्याचा हुकूम दिला नाही. इमाम इब्ने कसीर म्हणतात, की या महावाक्यानंतर अल्लाहतआलाने शपथेचे प्रायश्चित्त वर्णन केले आहे. ज्याने ठाऊक होते की, कोण्या हलाल वस्तूंला हराम करून घेणे, शपथ घेण्यासारखे आहे. जे प्रायश्चित्त घेण्यास पात्र आहे. परंतु हा आधार सही हदीर्शींच्या उपस्थितीत चिंतम मनन करण्याचा आहे. इमाम शौकानीचे म्हणणेच बरोबर आहे.

३) शपथ जिला अरबीत हलफ किंवा यमीन म्हणतात, ज्याचे अनेकवचन ''अहलाफ आणि अयमान'' आहे, तीन प्रकारची आहे. १) (लग्व) निरर्थक (२) (गमुस) खोटीशपथ (३) (मुअक्कदा) विचारपूर्वक घेतलेली शपथ. निरर्थक ती शपथ आहे, जी माणून गोष्टी गोष्टीत सवयीनुसार कुठल्याही नियत आणि मनाच्या इराद्याशिवाय शपथ घेत असतो. याच्यावर काही विचारपूस किंवा पकड नाही. 'गमुस' ती खोटी शपथ आहे, जी माणूस धोका देण्यासाठी आणि फसविण्यासाठी घेईल. हा मोठा अपराध आहे;किंबहुना मोठ्या गुन्ह्यात मोठा गुनाह आहे. परंतु याच्यावर प्रायश्चित्त नाही. 'मुअक्कदा' ती शपथ आहे, जी माणूस आपल्या म्हणण्याच्या ताकीद आणि पक्केपणासाठी विचारपूर्वक मनाच्या इराद्याने घेईल. अशी शपथ जर मोडेल, तर याचे प्रायश्चित्त आहे.. जे पुढे महावाक्यांत वर्णन करण्यांत येत आहे.

४) या खाण्याच्या प्रमाणांत काही खरी रिवायत नाही; म्हणून मतभेद आहेत. तथापि इमाम शाफईने या हदीसने आधार घेत, ज्यांत रमजानमध्ये उपासाच्या स्थितीत पत्नीशी संभोग करणाऱ्यांसाठी प्रायश्चित्तचा उल्लेख आहे. एक मुद्द (सुमारे अर्धाकिलो) प्रत्येक गरीबाची खुराक ठरविली आहे. कारण की, नबी ﷺ नी त्या माणसाला संभोगाचे प्रायश्चित्त घेण्यासाठी पंधरा साअ खजुरी दिल्या होत्या. ज्या साठ गरीबांना वाटावयाच्या होत्या. एका साअमध्ये ४ मुद्द असतात. या अनुषंगाने भाजी शिवाय दहा गरीबांकरीता दहा मुद्द (म्हणजे सव्वा सहा शेर किंवा सहा किलो) खुराक, प्रायश्चित्त होईल (इब्ने कसीर)

५) पोषाखाच्या बाबतीत पण मतभेद आहेत. उघडरीत्या अभिप्रेत एक जोड कपडे आहेत, ज्यांत मनुष्य नमाज पढूशकेल.

६) काही धर्मपंडित, चुकीने घडून आलेल्या खुनाच्या प्राणमूल्यावर अंदाज करून, दासी आणि गुलामांकरीता ईमानाची अट लागूं करतात. इमाम शौकानी म्हणतात, महावाक्य सर्वसाधारण आहे; मोमिन आणि काफिर दोन्ही यात शामिल आहेत.

७)म्हणजे ज्याला उपरोक्त चर्चित तिन्ही प्रकारचे फिदिया देण्याची क्षमता नसेल त्याने तीन दिवसाचे उपवास ठेवावे. हे उपवास त्याच्या शपथेचे प्रायश्चित्त असेल. काही धर्मपंडित खंड न पडता उपवास ठेवण्याला मान्यता देणारे आहेत; आणि काहींजवळ दोन्ही प्रकारे योग्य आहे.

يٰۤاَيُّهَا الَّذِيۡنَ اٰمَنُوۡۤا اِنَّمَا الۡخَمۡرُ وَالۡمَيۡسِرُ وَالۡاَنۡصَابُ وَالۡاَزۡلَامُ رِجۡسٌ مِّنۡ عَمَلِ الشَّيۡطٰنِ فَاجۡتَنِبُوۡهُ لَعَلَّكُمۡ تُفۡلِحُوۡنَ ﴿٩٠﴾

**हे ईमानवाल्यांनो! गोष्ट ही आहे की, दारू आणि जुगार आणि मूर्ती वगैरे, आणि शकून पहाण्याचे बाण, या सर्व घाणेरड्या गोष्टी आणि शैतानी कामे आहेत; याच्यापासून दूर रहा की, (कदाचित्) तुम्ही सफल होऊन जाल[१] ९०**

اِنَّمَا يُرِيۡدُ الشَّيۡطٰنُ اَنۡ يُّوۡقِعَ بَيۡنَكُمُ الۡعَدَاوَةَ وَالۡبَغۡضَآءَ فِى الۡخَمۡرِ وَالۡمَيۡسِرِ وَيَصُدَّكُمۡ عَنۡ ذِكۡرِ اللّٰهِ وَعَنِ الصَّلٰوةِ‌ ۚ فَهَلۡ اَنۡتُمۡ مُّنۡتَهُوۡنَ ﴿٩١﴾

**शैतान तर असे इच्छितो की, दारू आणि जुगारामुळे, तुमच्या आपसांत वैर आणि द्वेष टाकून द्यावा आणि अल्लाहतआलाच्या स्मरणांकडून आणि नमाजीकडून तुम्हांस दूर ठेवावे[२]; तर आता तरी माघारी परत फिरा ९१**

وَاَطِيۡعُوا اللّٰهَ وَاَطِيۡعُوا الرَّسُوۡلَ وَاحۡذَرُوۡا‌ ۚ فَاِنۡ تَوَلَّيۡتُمۡ فَاعۡلَمُوۡۤا اَنَّمَا عَلٰى رَسُوۡلِنَا الۡبَلٰغُ الۡمُبِيۡنُ ﴿٩٢﴾

**आणि तुम्ही अल्लाहतआलाचे आज्ञापालन करत रहा. आणि पैगंबराचे आज्ञापालन करीत रहा. आणि (आज्ञाभंगापासून) जपत रहा; जर तोंड फिरवाल, तर लक्षात ठेवा की, आमच्या पैगंबराकडे, तर स्पष्टपणे पोहचते करणे आहे ९२**

لَيۡسَ عَلَى الَّذِيۡنَ اٰمَنُوۡا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ جُنَاحٌ فِيۡمَا طَعِمُوۡۤا اِذَا مَا اتَّقَوْا وَّاٰمَنُوۡا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ ثُمَّ اتَّقَوْا وَّاٰمَنُوۡا ثُمَّ اتَّقَوْا وَّاَحۡسَنُوۡا‌ ؕ وَاللّٰهُ يُحِبُّ الۡمُحۡسِنِيۡنَ ﴿٩٣﴾

**अशा लोकांवर जे की, ईमान बाळगतात आणि चांगली कामे करतात, या गोष्टीत काही गुनाह नाही की, जिला ते खातपित असतील, जेव्हा की ते लोक ईशभय बाळगत असतील आणि ईमान ठेवत असतील.आणि चांगली कामे करीत असतील, मग सदाचरण आचरत असतील, आणि ईमान बाळगत असतील, नंतर मग पुन्हा जपले आणि खूप चांगली कामे करत असतील, अल्लाहतआला अशा सुकृत्य करणाऱ्यांस[३] प्रिय ठेवतो ९३**

१) हा दारूच्या बाबतीत तिसरा हुकूम आहे. पहिल्या आणि दुसऱ्या हुकूमांत स्पष्टरीत्या मनाई करण्यात आली नव्हती. परंतु येथे तिला आणि तिच्याबरोबर जुगार, किंवा मूर्तींची स्थाने, आणि शकून घेण्याच्या बाणांना घाणेरडी आणि शैतानी कामे ठरवून स्पष्टपणे त्यांच्यापासून वाचण्याचा हुकूम देण्यात आला आहे. याशिवाय या महावाक्यांमध्ये दारू आणि जुगाराचे आणखी नुकसान वर्णन करून प्रश्न केला गेला आहे की, आता तरी त्यापासून परावृत्त व्हाल की नाही? ज्यांत उद्देश ईमानवाल्यांची कसोटी घेणे आहे. म्हणून जे ईमानवाले होते, ते तर अल्लाहची मन्शा समजून गेले आणि याचे संपूर्ण हराम होण्याचे त्यांनी मान्य करून घेतले आणि म्हटले, ''हे आमच्या पालनकर्त्या ! आम्ही यापासून परावृत्त झालो.'' (मुसनद अहमद) परंतु आजकालचे काही 'शहाणे' म्हणतात की, अल्लाहतआलाने दारूला हराम कोठे ठरविले आहे ? म्हणजे दारूला घाणेरडे आणि शैतानी काम ठरवून त्यांपासून वाचण्याचा हुकूम देणे; तसेच या वाचण्याला सफल होण्याला कारणीभूत ठरविणे, या 'सुधारकां'जवळ हराम होण्यास पुरेसा नाही. याचा अर्थ हा झाला की, अल्लाहजवळ घाणेरडे कामपण योग्य आहे. ज्याच्याबाबतीत अल्लाहतआला वाचण्याचा हुकूम देतो, ते पण योग्य आहे. आणि ज्याच्या बाबतीत सांगेल की, याचे करणे असफलता आणि त्याचे न करणे, साफल्याला कारणीभूत आहे. ते पण योग्य आहे. ''इन्नालिल्लाहे व इन्ना इलैहे राजिऊन!'' हजारवेळा अल्लाहचा आश्रय, अशा 'सुधारणे' पासून आणि धिक्कार आहे अशा, रितीने कुरआनाच्या समजण्यावर.

२) हे दारू आणि जुगाराचे आणखी सामाजिक आणि धार्मिक नुकसान आहे. ज्याच्या स्पष्टीकरणाची आवश्यकता नाही. याचसाठी दारूला पापांची जननी म्हटले जाते. आणि जुगारपण अशीच वाईट खोड आहे, की ही माणसाला काहीच कामाचे ठेवत नाही. आणि केव्हा केव्हा धनिकांना आणि वडिलोपार्जित जहागिरदारांना कफल्लक आणि दरिद्री बनवून टाकते. ''अआज नल्लाहु मिनहुमा.''

३) दारूच्या हराम झाल्यानंतर काही सहाबांच्या ﷺ डोक्यात असा विचार आला की, आमचे कित्येक साथीदार जे युद्धात शहीद किंवा असेच मृत्यू पावले, जेव्हा की ते दारू पित असत. तर या महावाक्यांत या शंकेचे निरसन करून देण्यात आले आहे की, त्यांचा शेवट ईमान आणि ईशभयावरच झाला आहे. कारण की, दारू त्यावेळेपावेतो हराम झाली नव्हती.

يَآيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَيَبْلُوَنَّكُمُ اللّٰهُ بِشَيْءٍ مِّنَ الصَّيْدِ تَنَالُهٗٓ اَيْدِيْكُمْ وَرِمَاحُكُمْ لِيَعْلَمَ اللّٰهُ مَنْ يَّخَافُهٗ بِالْغَيْبِ ۚ فَمَنِ اعْتَدٰى بَعْدَ ذٰلِكَ فَلَهٗ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٩٤﴾

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहतआला थोड्याशा शिकारीने तुमची परीक्षा घेईल.[१] ज्या (शिकारी) पर्यंत, तुमचे हात आणि तुमचे भाले पोहचू शकतील[२]. कारण की, अल्लाहतआलाने माहित करून घ्यावे की कोण माणूस त्याला पाहिल्याशिवाय (त्याला) भितो. तर जो माणूस याच्यानंतर मर्यादेचे उल्लंघन करेल, त्याच्यासाठी यातनादायक शिक्षा आहे ९४

يَآيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَقْتُلُوا الصَّيْدَ وَاَنْتُمْ حُرُمٌ ۭ وَمَنْ قَتَلَهٗ مِنْكُمْ مُّتَعَمِّدًا فَجَزَاۗءٌ مِّثْلُ مَا قَتَلَ مِنَ النَّعَمِ يَحْكُمُ بِهٖ ذَوَا عَدْلٍ مِّنْكُمْ هَدْيًۢا بٰلِغَ الْكَعْبَةِ اَوْ كَفَّارَةٌ طَعَامُ مَسٰكِيْنَ اَوْ عَدْلُ ذٰلِكَ صِيَامًا لِّيَذُوْقَ وَبَالَ اَمْرِهٖ ۭ عَفَا اللّٰهُ عَمَّا سَلَفَ ۭ وَمَنْ عَادَ فَيَنْتَقِمُ اللّٰهُ مِنْهُ ۭ وَاللّٰهُ عَزِيْزٌ ذُو انْتِقَامٍ ﴿٩٥﴾

हे ईमानवाल्यांनो! शिकार करू नका; जेव्हा की, तुम्ही 'एहराममध्ये' (हज्जच्या वस्त्रांत) असाल[३]. आणि जो मनुष्य तुमच्यातून जाणून बुझून (शिकार) ला ठार करील[४], तर त्याच्यावर प्राणमूल्य लागू होईल, जे त्याच सारखे असेल, त्या जनावरासारखे ज्याला त्याने ठार केले आहे[५]. ज्याचा निर्णय तुमचे दोन भरोश्यावाले लोक करतील[६]. मग ते प्राणमूल्य खास चतुष्पादांतून असो, जे नवस म्हणून काबापर्यंत पोहचविले जावे[७]. किंवा मग प्रायश्चित्त गरीब लोकांना दिले जावे. किंवा मग त्याचे बरोबर उपास ठेवून घेतले जावेत[८]. अशासाठी की त्याने आपल्या कर्माची गोडी चाखावी. पूर्वी जे झाले गेले, त्याला अल्लाहतआलाने माफ करून टाकले. आणि जो मनुष्य पुन्हा असेच काम करील, तर अल्लाहतआला बदला घेईल. आणि अल्लाहतआला प्रबळ आणि बदला घेणारा आहे ९५

اُحِلَّ لَكُمْ صَيْدُ الْبَحْرِ وَطَعَامُهٗ مَتَاعًا لَّكُمْ وَلِلسَّيَّارَةِ ۚ وَحُرِّمَ عَلَيْكُمْ صَيْدُ الْبَرِّ مَا دُمْتُمْ حُرُمًا ۭ وَاتَّقُوا اللّٰهَ الَّذِيْٓ اِلَيْهِ تُحْشَرُوْنَ ﴿٩٦﴾

तुमच्यासाठी समुद्रातील शिकार पकडणे; आणि त्याचे खाणे हलाल केले गेले आहे[९]; तुमच्या फायद्यासाठी आणि प्रवाशांसाठी. आणि जमिनीवरील शिकार पकडणे, तुमच्यासाठी हराम केले गेले आहे; जोपर्यंत तुम्ही 'एहराम' च्या स्थितीत असाल, आणि अल्लाहतआलाला भ्या; ज्याच्याजवळ तुम्ही एकत्र होऊन जाणार आहात ९६

جَعَلَ اللّٰهُ الْكَعْبَةَ الْبَيْتَ الْحَرَامَ قِيٰمًا لِّلنَّاسِ وَالشَّهْرَ الْحَرَامَ وَالْهَدْيَ وَالْقَلَاۗىِٕدَ ۭ ذٰلِكَ لِتَعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ يَعْلَمُ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ وَاَنَّ اللّٰهَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿٩٧﴾

अल्लाहने काब्याला, जे की आदरणीय घर आहे, लोकांच्या कायम रहाण्याचे साधन ठरविले आहे. आणि पवित्र महिन्यांसपण आणि हरममध्ये कुरबानी होणाऱ्या जनावरांस सुद्धा. आणि त्या जनावरांना सुद्धा, ज्यांच्या गळ्यांत पट्टे असतील[१०]. हे यासाठी की, तुम्ही या गोष्टीचा विश्वास बाळगावा की नि:संशय अल्लाह, सर्व आकाशातील व जमिनीतील सर्व वस्तूचे ज्ञान ठेवतो आणि नि:संशय अल्लाह सर्व वस्तूंना फार चांगल्या प्रकारे जाणतो ९७

اِعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ شَدِيْدُ الْعِقَابِ وَاَنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٩٨﴾

तुम्ही विश्वास बाळगा की, अल्लाहतआला शिक्षापण फार कडक देणारा आहे; आणि अल्लाहतआला मोठा क्षमाकर्ता आणि दयाळूपण आहे ९८

مَا عَلَى الرَّسُوْلِ اِلَّا الْبَلٰغُ ۭ وَاللّٰهُ يَعْلَمُ مَا تُبْدُوْنَ وَمَا تَكْتُمُوْنَ ﴿٩٩﴾

पैगंबरावर तर फक्त पोहचविण्याची जबाबदारी आहे; आणि अल्लाहतआला सर्व काही जाणतो; जे काही तुम्ही जाहीर करता, आणि जे काही तुम्ही लपवून ठेवता ९९

१) शिकार अरबांच्या रोजीरोटीचे एक महत्त्वाचे साधन होते. म्हणून 'एहराम' च्या स्थितीत हिची मनाई करुन, त्यांची परीक्षा घेण्यात आली. विशेष करून हुदैबियाच्या मुक्कामी भरपूर शिकारीचे जनावरे सहाबांच्या ﵃ च्या जवळ जवळ येत. परंतु याच दिवसांत या चार महावाक्यांचे अवतरण झाले; ज्यात याच्याशी संबंधित आदेश, वर्णन केले गेले.

२) जवळची शिकार किंवा लहान प्राणी सर्वसाधारणपणे हातानेच पडकले जातात. आणि दूरचे मोठी जनावरे यांच्यासाठी बाण आणि भाले यांचा उपयोग होत असे. म्हणून फक्त या दोहोंचे येथे वर्णन करण्यात आले आहे. परंतु

अभिप्रेत हे आहे की, ज्या प्रकारे सुद्धा आणि ज्या वस्तूनेपण शिकार केली जाईल, ''एहराम' च्या स्थितीत मना आहे.
३) इमाम शाफईने याच्याने अभिप्रेत फक्त त्या जनावरांची कत्तल घेतली आहे; जे खाण्याच्या कामांत येतात. दुसऱ्या जंगलातील प्राण्यांचा वध ते योग्य ठरवितात. परंतु बहुतेक धर्मपंडितांजवळ याच्यात काही भेदभाव नाही. खुराक आणि खुराका व्यतिरिक्त दोन्ही प्रकारची जनावरे यांत शामील आहेत. परंतु त्रास देणाऱ्या जनावरांना ठार करणे योग्य आहे. ज्यांना या हुकूमातून वगळण्याचे हदीशीमध्ये आले आहे. आणि ते पांच आहेत. १) कावळा २) घार ३) विंचू ४) उंदीर आणि ५) पिसाळलेला कुत्रा (स.मुस्लीम, मौता इमाम मालीक) ह.नाफेअ ﷺ ला सर्पाबद्दल प्रश्न विचारण्यात आला, तर त्यांनी सांगितले की याच्या ठार करण्यांत तर काही मतभेदच नाही (इब्ने कसीर) आणि इमाम अहमद आणि इमाम मालीक आणि दुसऱ्या धर्मपंडितांनी लांडगा आणि जंगली जनावरे चित्ते आणि वाघ यांना पिसाळलेल्या कुत्र्यांत जमा करून एहरामच्या स्थितीत पण त्यांना ठार करणे योग्य म्हटले आहे. (इब्ने कसीर)
४) 'जाणून बुझून' या शब्दांनी काही धर्मपंडितांनी हा आधार घेतला आहे की, इरादाशिवाय म्हणजे चूकीने ठार करून टाकेल, तर त्याच्यासाठी फिद्या (प्राणमूल्य) नाही. परंतु बहुतेक धर्मपंडितांजवळ विसरून किंवा चुकीनेपण ठार केले गेले तर प्राणमूल्य (फिद्या) लागू होईल. जाणून बुझूनची अट परिस्थितीनुसार आहे, एक शर्त म्हणून नाही.
५) त्या सारख्या जनावराने अभिप्रेत उंची आणि जाडीमध्ये त्या सारखे असणे आहे किंमतीत सारखे असणे नाही. जसे की, अहनाफचा दस्तुर आहे. उदाहरणार्थ जर हरणाला ठार केले आहे, तर त्याच्यासारखी बकरी आहे. निलगायला ठार केले तर तिच्यासारखी गाय आहे, वगैरे. तथापि ज्या जनावराचा 'मिस्ल' (सारखा) मिळत नसेल, तेथे त्याची किंमत फिद्या म्हणून घेऊन मक्केला पोहचवून देण्यात येईल. (इब्ने कसीर)
६) की, ठार झालेल्या जनावराची 'मिस्ल' (सारखेपणा) अमुक जनावर आहे, आणि तो जर 'गैर मिस्ल' (म्हणजे सारखा नाही) आहे. किंवा त्याच्यासारखा मिळत नाही; तर त्याची जितकी किंमत आहे. त्या किंमतीचे धान्य खरेदी करून मक्केच्या गरीबांमधून प्रत्येक गरीबाला एक 'मुद्द' च्या हिशोबाने वाटून टाकण्यात येईल. अहनाफच्या जवळ प्रत्येक गरीबाला दोन 'मुद्द' आहे.
७) हा फिद्या (प्राणमूल्य) जनावर किंवा त्याची किंमत काब्याला पोहचविण्यात येईल आणि काब्याने अभिप्रेत 'हरम' आहे. (फत्हुल कदीर) म्हणजे यांची वाटणी हरमे मक्काच्या हद्दीत राहणाऱ्या गरीबांवर होईल.
८) म्हणजे प्रायश्चित्त गरीबांना जेवण घालणे किंवा त्यांच्या संख्येबरोबर उपास ठेवणे, दोहोंपैकी कोणा एकावर अंमलबजावणी करणे योग्य आहे. ठार झालेल्या जनावरांच्या हिशेबाने जेवणामध्ये ज्याप्रमाणे कमी जास्त होईल, उपवासांमध्ये सुद्धा कमी जास्त होईल. उदाहरणार्थ एहराम परिधान केलेल्याने हरिण मारले आहे. तर त्याच्या सारखी बकरी आहे. हा फिद्या हरमे मक्कामध्ये जबाह केला जाईल. जर हे मिळाले नाही, तर इब्ने अब्बास ﷺ च्या म्हणण्याप्रमाणे, सहा गरीबांना जेवण किंवा तीन दिवसाचे उपवास ठेवावे लागतील. जर त्याने बारासिंगा, सांबर किंवा या सारखा कोणी प्राणी मारला आहे, तर त्याच्यासारखी गाय आहे. जर ती मिळाली नाही, किंवा याचे सामर्थ्य नसेल, तर वीस गरीबांना जेवण, किंवा वीस दिवसांचे उपावास ठेवावे लागतील किंवा असा प्राणी (शहामृग वगैरे) ठार केला आहे. ज्याची मिस्ल उंट आहे, तर त्याच्या न मिळण्याच्या स्थितीत, तीस गरीबांना भोजन किंवा तीस दिवसाचे उपवास ठेवावे लागतील. (इब्ने कसीर)
९) 'सैद' ने अभिप्रेत जिवंत जनावर आणि 'तआमहू' ने अभिप्रेत ते मृत (मासे वगैरे) आहे. जे समुद्र किंवा नदी बाहेर फेकून देईल किंवा पाण्याचे वरती येऊन जाईल. ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धा स्पष्टीकरण आहे की, समुद्राचा मुर्दाड (मृत) हलाल आहे. (तपशीलासाठी पहावे, तफसीर इब्ने कसीर व नैलुल अवतार वगैरे)
१०) काब्याला बैतुल हराम यासाठी म्हटले जाते की त्याच्या हद्दीत, शिकार करणे,वृक्ष तोडणे वगैरे हराम आहे. अशाच प्रकारे यांच्यात जर बापाचा खुनी जरी समोर आला, तरी त्याच्याशी, अडवणूक केली जात नसे. याला कियामन् लिन्नास (लोकांचे मुक्कामाचे ठिकाण आणि रोजीचे साधन) ठरविण्यात आले आहे. ज्याचा अर्थ आहे की, याच्या मार्फत मक्कावाल्यांची व्यवस्था पण बरोबर आहे. आणि त्यांच्या ऐहिक गरजा भागविण्याचे पण साधन आहे. याचप्रमाणे सन्माननीय महिने (रजब,जुलकादा,जुलहज्जा आणि मोहर्रम) आणि हरममध्ये जाणारी जनावरे (हदी आणि कलाईद) पण 'कियामन लिन्नास' आहेत. की, या सर्व वस्तूंनी पण, मक्कावाल्यांना चर्चित फायदे प्राप्त होत होते.

قُل لَّا يَسْتَوِي الْخَبِيثُ وَالطَّيِّبُ وَلَوْ أَعْجَبَكَ كَثْرَةُ الْخَبِيثِ ۚ
فَاتَّقُوا اللَّهَ يَا أُولِي الْأَلْبَابِ لَعَلَّكُمْ تُفْلِحُونَ ﴿١٠٠﴾

**आपण सांगून टाका की अपवित्र आणि पवित्र बरोबर नाही; जरी तुम्हास अपवित्राचे बाहुल्य, चांगले वाटत असेल[१]. अल्लाहतआलाला भीत रहा, हे बुध्दिमानांनो! अशाकरिता की तुम्ही सफल व्हावे ﴾१००﴿**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تَسْأَلُوا عَنْ أَشْيَاءَ إِن
تُبْدَ لَكُمْ تَسُؤْكُمْ ۚ وَإِن تَسْأَلُوا عَنْهَا حِينَ يُنَزَّلُ
الْقُرْآنُ تُبْدَ لَكُمْ ۚ عَفَا اللَّهُ عَنْهَا ۗ وَاللَّهُ غَفُورٌ
حَلِيمٌ ﴿١٠١﴾

**हे ईमानवाल्यांनो! अशा गोष्टी विचारू नका; की जर (त्या) तुमच्यावर जाहीर करून दिल्या जातील, तर तुम्हास वाईट वाटू लागेल. आणि जर तुम्ही, कुरआनाच्या अवतरण्याच्या काळात, या गोष्टींना विचाराल तर त्या तुमच्यावर जाहीर करून देण्यात येतील[२]. मागे विचारलेले प्रश्न अल्लाहने माफ करून टाकले. आणि अल्लाह मोठा क्षमाकर्ता आणि सौम्य आहे ﴾१०१﴿**

قَدْ سَأَلَهَا قَوْمٌ مِّن قَبْلِكُمْ ثُمَّ أَصْبَحُوا بِهَا
كَافِرِينَ ﴿١٠٢﴾

**अशा गोष्टी तुमच्या आधी, आणखी लोकांनी पण विचारल्या होत्या; मग त्या गोष्टींना नाकारणारे बनून गेले[३] ﴾१०२﴿**

مَا جَعَلَ اللَّهُ مِن بَحِيرَةٍ وَلَا سَائِبَةٍ وَلَا وَصِيلَةٍ
وَلَا حَامٍ ۙ وَلَٰكِنَّ الَّذِينَ كَفَرُوا يَفْتَرُونَ عَلَى
اللَّهِ الْكَذِبَ ۖ وَأَكْثَرُهُمْ لَا يَعْقِلُونَ ﴿١٠٣﴾

**अल्लाहतआलाने 'बहीरा' ला मुकर्रर केले नाही; आणि ना 'साईबा' ला आणि ना 'वसिल्या' ला आणि ना 'हाम'[४] ला. परंतु जे लोक काफिर आहेत, ते अल्लाहतआलावर खोटे (थोतांड) रचतात. आणि बहुतेक काफिर अक्कल ठेवत नाही ﴾१०३﴿**

وَإِذَا قِيلَ لَهُمْ تَعَالَوْا إِلَىٰ مَا أَنزَلَ اللَّهُ وَإِلَى
الرَّسُولِ قَالُوا حَسْبُنَا مَا وَجَدْنَا عَلَيْهِ آبَاءَنَا ۚ
أَوَلَوْ كَانَ آبَاؤُهُمْ لَا يَعْلَمُونَ شَيْئًا وَلَا يَهْتَدُونَ ﴿١٠٤﴾

**आणि जेव्हा त्यांना सांगण्यात येते की, अल्लाहतआलाने जे हुकूम सादर केले आहेत, त्यांच्याकडे आणि पैगंबराकडे चला. तर म्हणतात की, आम्हांस तेच पुरेसे आहे, ज्यांच्यावर आम्ही आमच्या वाडवडिलांना पावलो. जरी त्यांचे वाडवडील काहीच जाणत नसतील आणि ना सरळ मार्गावर असतील ﴾१०४﴿**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا عَلَيْكُمْ أَنفُسَكُمْ ۖ لَا يَضُرُّكُم
مَّن ضَلَّ إِذَا اهْتَدَيْتُمْ ۚ إِلَى اللَّهِ مَرْجِعُكُمْ جَمِيعًا
فَيُنَبِّئُكُم بِمَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿١٠٥﴾

**हे ईमानवाल्यांनो! (तुम्ही) आपली काळजी करा. जेव्हा की तुम्ही सरळ मार्गावर चालत आहात. जो मनुष्य भटकलेला आहे, त्याच्याने तुमचे काहीच नुकसान नाही[५]. अल्लाहजवळ तुम्हा सर्वांस जाणे आहे. मग तो तुम्हा सर्वास दाखवून देईल, जे काही तुम्ही सर्व करीत होता ﴾१०५﴿**

१) खबीस (अपवित्र) ने अभिप्रेत, हराम किंवा काफिर किंवा गुनहगार किंवा रद्दी. आणि तय्यब, (पवित्र) ने अभिप्रेत हलाल, किंवा मोमिन, किंवा आज्ञाधारक आणि चांगली वस्तूआहे. किंवा हे सर्व पण अभिप्रेत होऊ शकतात. अर्थ असा की ज्या वस्तूंत नापाकी (अपावित्र्य) असेल, ते 'कुफ्र' असेल, बदकारी (वाईट कृत्य) असेल, वस्तू किंवा म्हणणे असेल. बाहुल्य असून सुद्धा ते या गोष्टींचा मुकाबला करू शकत नाही, ज्यांच्यांत पावित्र्य असेल. हे दोन्ही कुठल्याही प्रकारे, बरोबर (समान) होऊ शकत नाही. कारण की अपावित्र्याच्या कारणाने, त्या वस्तूतील फायदा आणि बरकत संपून जाते. जेव्हा की ज्याही वस्तूत पावित्र्य असेल, तिच्यात याच्यामुळे फायद्यात आणि बरकतीत वाढ होईल.

२) ही मनाई कुरआनाच्या अवतरण्याच्या वेळेसाठी होती. स्वत: नबी ﷺ पण, सहाबा ﷺ ला जास्त प्रश्न विचारण्यापासून मना करीत असत. एका हदीसमध्ये आपण ﷺ नी फर्मावले, ''मुसलमानांमध्ये तो सर्वांत मोठा अपराधी आहे, ज्याच्या प्रश्न विचारण्याच्या कारणाने, कोणी वस्तू हराम करून टाकली गेली. वास्तविक पहाता, याच्यापूर्वी ती हलाल होती.'' (स.बुखारी, स.मुस्लीम)

३) कोठे या हलगर्जीपणाला तुम्हीपण जबाबदार होऊन जाल. ज्याप्रमाणे एकदा नबी ﷺ नी सांगितले, ''अल्लाहतआलाने तुमच्यावर हज फर्ज केला आहे.'' एका माणसाने प्रश्न केला, ''काय प्रत्येक वर्षी ?'' आपण ﷺ खामोश राहिले. त्याने तीन वेळा प्रश्नांची पुनरावृत्ती केली. मग आपण ﷺ नी सांगितले ''जर मी हो सांगून दिले असते

तर, हज दरवर्षी फर्ज झाला असता; आणि जर असे झाले असते, तर दरवर्षी हज करणे तुमच्यासाठी शक्य झाले नसते.'' (स.मुस्लीम किताबुल हज हदीस क्र.४१२, व मुसनद अहमद, सुनन अबुदाऊद, निसाई, इब्ने माजा) याचसाठी काही भाष्यकारांनी, 'अफल्लाहु अनहा' चा एक अर्थ हा पण सांगितला आहे की ज्या वस्तूचा उल्लेख अल्लाहने आपल्या पुस्तकात केलेला नाही; मग तो त्या वस्तूंमधून आहे, ज्यांना अल्लाहने माफ करून टाकले आहे. बस, तुम्ही पण त्याबाबतीत खामोश रहा ज्याप्रमाणे तो खामोश राहील. (इब्ने कसीर) एका हदीसमध्ये, नबी ﷺ नी, या विषयाला या शब्दांत वर्णन केले आहे, ''तुम्हास ज्या वस्तूंच्या बाबत सांगण्यात आले नाही, तुम्ही याबाबतीत मला प्रश्न करू नका. यासाठी की, तुमच्या पूर्वीच्या उम्मतींना, हलाक करण्याला कारणीभूत त्यांचे जास्त प्रश्न विचारणे आणि आपल्या पैगंबराशी मतभेदपण होता.'' (स.मुस्लीम)

४) हे त्या जनावरांचे प्रकार आहेत; जे अरबचे लोक आपल्या मूर्तीसाठी नवस मानीत असत. त्यांचे वेगवेगळे खुलासे केले गेले आहेत. ह.सईद बिन मुसैब ؓ कडून, सहीह बुखारीमध्ये याचा खुलासा खालील प्रमाणे करण्यात आला आहे. ''बहीरा'ते जनावर, ज्याचे दूध काढणे सोडून दिले जात असे आणि सांगण्यात येत असे की, हे मूर्तीसाठी आहे. म्हणून कोणीही माणूस त्यांच्या स्तनांना, हात लावीत नसे. 'साईबा' ते जनावर आहे, ज्याला ते मूर्तीसाठी मुक्त सोडून देत असत. त्याला स्वारीसाठी, किंवा ओझे वाहतुकीसाठी उपयोगांत आणित नसत. 'वसीला' ती उंटीण आहे, जिच्यापासून पहिल्याच वेळी मादी जन्माला येई. आणि याच्यानंतर दुसऱ्यांदा पण मादीच जन्माला येईल. (म्हणजे एका मादीनंतर, दुसरी मादी मिळून गेली; यांच्या दरम्यान कोणी नराने फरक झाला नाही.) अशा उंटणीला पण ते मूर्तीसाठी मुक्त सोडून देत असत. आणि 'हाम' तो नर उंट आहे. ज्याच्या वंशातून कित्येक पिले होऊन चुकत. (आणि वंश खूप वाढून जाई.) तर त्याच्या पासून पण ओझे वाहतूक किंवा स्वारीचे काम घेत नसत. आणि मूर्तीसाठी सोडून देत. आणि त्याला ते 'हामी' म्हणत.'' या रिवायतीत ही हदीस पण वर्णन करण्यात आली आहे की, सर्वांत प्रथम मूर्तीसाठी जनावर मुक्त करणारा माणूस अम्र बिन आमिर खिजाई होता. नबी ﷺ म्हणतात, की,''मी त्याला नरकाग्नीत, आंतड्या ताणतांना पाहिले.'' (स.बुखारी तफसीर सू.माइदः) महावाक्यांत सांगण्यात आले आहे की, अल्लाहतआलाने या जनावरांना अशा प्रकारे मुकर्रर् केले नाही; कारण की, त्याने नवस तर खास आपल्यासाठी राखून ठेवला आहे. मूर्तीसाठी या नवसांच्या पद्धती, बहुदेववाद्यांनी शोधून काढल्या आहेत. आणि मूर्ती आणि खोटे उपास्यांच्या नावावर जनावर सोडणे व नवस व नियाज देण्याचा क्रम आजपण मुश्रिकांमध्ये, किंबहुना पुष्कळशा नांवापुरते मुसलमान असणाऱ्यांमध्ये पण कायम आणि चालू आहे. अआ जनल्लाहु मिनहु!

५) काही लोकांच्या डोक्यांत उघड शब्दांनी अशी शंका निर्माण झाली की, आपली सुधारणा करून घेतली तर पुरेशी आहे. भलाईचा हुकूम करणे आणि वाईट कामापासून मना करणे आवश्यक नाही. परंतु हा अर्थ खरा नाही. कारण की, भलाईचा हुकूम करण्याचे कर्तव्य फार महत्त्वाचे आहे. जर एक मुसलमान हे कर्तव्य सोडून देईल, तर त्याचा सोडणारा, हिदायतवर कायम राहणारा कसा होईल? जेव्हा की कुरआनाने, ''जेव्हा तुम्ही स्वत: हिदायतवर चालणारे आहात.'' ची अट लागू केली आहे. याच्याकरीता जेव्हा ह.अबु बकर सिद्दीक ؓ च्या आज्ञांत ही गोष्ट आली तर त्यांनी सांगितले की, लोकांनो! तुम्ही या महावाक्याला चुकीच्या जागी वापरत आहात. मी तर नबी ﷺ ला फर्मावितांना ऐकले आहे की, ''जेव्हा लोक वाईट कृत्य होताना पाहून घेतील, आणि त्याला बदलण्याचा प्रयत्न करणार नाही, तर जवळच आहे की, अल्लाहतआला त्यांना आपल्या शिक्षेत पकडून घेईल.'' (मुसनद अहमद) यासाठी महावाक्याचा खरा अर्थ हा आहे की, तुमच्या समजाविल्यानंतर सुद्धा, जर लोक पुण्याचा मार्ग स्वीकारणार नाही किंवा वाईट कृत्यापासून परावृत्त होणार नाही तर तुमच्यासाठी हे नुकसानदायक नाही; जेव्हा की तुम्ही स्वत: पुण्यावर कायम आणि वाईट कृत्यांपासून दूर आहांत. तथापि एक स्वरूपात, भलाईचा हुकूम करणे आणि वाईट कृत्यांपासून मना करणे, योग्य आहे की, जेव्हा कोणी मनुष्य आपल्यात ही शक्ती पावणार नाही, आणि याच्याने त्याच्या जिवाला धोका आहे; या स्वरूपात, ''जरी त्याच्यात शक्ती नसेल तर मनाने वाईट समजावे, आणि हा फार अशक्त ईमान आहे.'' च्याखाली याची शक्यता आहे हे महावाक्य पण या स्वरूपाचे समर्थन करते.

يَٰٓأَيُّهَا ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ شَهَٰدَةُ بَيْنِكُمْ إِذَا حَضَرَ أَحَدَكُمُ
ٱلْمَوْتُ حِينَ ٱلْوَصِيَّةِ ٱثْنَانِ ذَوَا عَدْلٍ مِّنكُمْ أَوْ ءَاخَرَانِ
مِنْ غَيْرِكُمْ إِنْ أَنتُمْ ضَرَبْتُمْ فِى ٱلْأَرْضِ فَأَصَٰبَتْكُم
مُّصِيبَةُ ٱلْمَوْتِ ۚ تَحْبِسُونَهُمَا مِنۢ بَعْدِ ٱلصَّلَوٰةِ فَيُقْسِمَانِ
بِٱللَّهِ إِنِ ٱرْتَبْتُمْ لَا نَشْتَرِى بِهِۦ ثَمَنًا وَلَوْ كَانَ ذَا قُرْبَىٰ ۙ
وَلَا نَكْتُمُ شَهَٰدَةَ ٱللَّهِ إِنَّآ إِذًا لَّمِنَ ٱلْءَاثِمِينَ ١٠٦

**हे ईमानवाल्यांनो! तुमच्यात आपसांत, दोन माणसांचे साक्षी होणे, योग्य आहे, जेव्हा की तुमच्यांतून कोणाला मृत्यू येऊ लागेल; आणि मृत्यूपत्र करण्याची वेळ येईल; ती दोन माणसे अशी असावीत, की सदाचरणी असावी आणि तुमच्यातूनच असावी[१]. किंवा दुसऱ्या समाजाची दोन माणसे असावीत. जर तुम्ही प्रवासात गेला असाल, (आणि) तुमच्यावर मृत्यूचा प्रसंग येऊन ठेपेल[२], (आणि) जर तुम्हाला शंका असेल, तर त्या दोघांना नमाजी नंतर थांबवून घ्या; मग दोघांनी अल्लाहची शपथ खावी की, आम्ही, यासाठी कुठलाही नफा घेऊ इच्छित नाही[३], जरी कोणी नातेवाईक का असेना. आणि अल्लाहच्या गोष्टीला आम्ही लपविणार नाही. आम्ही अशा स्थितीत फारच गुन्हेगार होऊ (१०६)**

فَإِنْ عُثِرَ عَلَىٰٓ أَنَّهُمَا ٱسْتَحَقَّآ إِثْمًا فَـَٔاخَرَانِ يَقُومَانِ
مَقَامَهُمَا مِنَ ٱلَّذِينَ ٱسْتَحَقَّ عَلَيْهِمُ ٱلْأَوْلَيَٰنِ
فَيُقْسِمَانِ بِٱللَّهِ لَشَهَٰدَتُنَآ أَحَقُّ مِن شَهَٰدَتِهِمَا وَمَا
ٱعْتَدَيْنَآ إِنَّآ إِذًا لَّمِنَ ٱلظَّٰلِمِينَ ١٠٧

**मग जर असे आढळून येईल, ते दोघे साक्षी कोण्या गुन्ह्यास पात्र[४] ठरले, तर या लोकांतून, ज्यांच्या मुकाबल्यात गुन्हा घडला होता, आणि दोन माणसे जे जवळचे (आप्त) आहेत; जेथे ते दोघे उभे राहिले होते[५], या दोघांनी उभे रहावे, मग दोघांनी अल्लाहची शपथ खावी की, खचितच् आमची ही शपथ, त्या दोघांच्या या शपथेपेक्षा जास्त योग्य आहे. आणि आम्ही अतिरेक केला नाही. असे केले असेल तर आम्ही नि:संशय जुलमी आहोत (१०७)**

ذَٰلِكَ أَدْنَىٰٓ أَن يَأْتُوا۟ بِٱلشَّهَٰدَةِ عَلَىٰ وَجْهِهَآ أَوْ يَخَافُوٓا۟
أَن تُرَدَّ أَيْمَٰنٌۢ بَعْدَ أَيْمَٰنِهِمْ ۗ وَٱتَّقُوا۟ ٱللَّهَ وَٱسْمَعُوا۟ ۗ
وَٱللَّهُ لَا يَهْدِى ٱلْقَوْمَ ٱلْفَٰسِقِينَ ١٠٨

**हा जवळचा मार्ग आहे, या हुकूमाचा, की त्या लोकांनी घटनेला ठीक प्रकारे जाहीर करावे. किंवा या गोष्टीपासून भिऊन जावे की त्यांच्याकडून शपथा घेतल्यानंतर, शपथा उलट्या पडून जातील[६]. आणि अल्लाहतआलाला भ्या आणि ऐका! आणि अल्लाहतआला आज्ञाभंग करणाऱ्या लोकांना सरळ मार्ग दाखवित नसतो (१०८)**

يَوْمَ يَجْمَعُ ٱللَّهُ ٱلرُّسُلَ فَيَقُولُ مَاذَآ أُجِبْتُمْ ۖ قَالُوا۟
لَا عِلْمَ لَنَآ ۖ إِنَّكَ أَنتَ عَلَّٰمُ ٱلْغُيُوبِ ١٠٩

**ज्या दिवशी, अल्लाहतआला सर्व पैगंबरांना एकत्र गोळा करील, मग फर्मावेल की तुम्हास काय उत्तर मिळाले होते? ते अर्ज करतील की आम्हास काही ठाऊक नाही[७], नि:संशय तूच गुप्त गोष्टींना जाणणारा आहेस (१०९)**

१) ''तुमच्यांतून आहे'' चा अर्थ काहींनी हा सांगितला आहे की, मुसलमानांमधून असावा. आणि काहींनी म्हटले आहे की, ''मूसी'' (मृत्यूपत्र करणाऱ्या) च्या घराण्यातून असावेत. अशाप्रकारे, 'आखरानी मिन गैरिकुम'' मध्ये दोन्ही प्रकार असतील म्हणजे 'मिन गैरिकुम' ने अभिप्रेत गैर मुस्लीम (ग्रंथधारी) असतील, किंवा मृत्यूपत्र करणाऱ्याच्या घराण्याशिवाय, दुसऱ्या घराण्याचे असतील.

२) म्हणजे प्रवासात, कोणी असा फारच आजारी होऊन जाईल की जिवंत वाचण्याची आशा न राहील; तर तो प्रवासांत, दोन न्यायी साक्षीदार बनवून, जे मृत्यूपत्र करू इच्छेल, ते करून घ्यावे.

३) म्हणजे मृत्यू पावणाऱ्या (वसीअत करणारा) च्या वारसदारांना शंका येईल, की त्यांच्या, ज्यांच्या समक्ष वसिअत केली गेली आहे, त्यांनी संपत्तीत लबाडी, किंवा फेरबदल केला आहे, तर ते नमाजीनंतर, म्हणजे लोकांच्या उपस्थितीमध्ये, त्यांच्याकडून शपथ घेतील, आणि त्यांनी शपथ खाऊन म्हणावे की, आम्ही

आमच्या शपथीबद्दल ऐहिक कोणताही फायदा मिळवीत नाही. म्हणजे खोटी शपथ खात नाही.
४) म्हणजे खोट्या शपथा खाल्ल्या आहेत.
५) 'औलयाने', 'अवला', चा 'तसनिया' आहे. अभिप्रेत आहे, मृत म्हणजे मृत्यूपत्र करणाऱ्याच्या जवळचे दोन नातेवाईक. 'मिनल्लज़ी नसतहक्क, अलैहिम' चा अर्थ आहे, ज्यांच्या मुकाबल्यात अपराधाचा प्रमाद घडला होता; म्हणजे खोट्या शपथेचा अपराध करून, त्यांना मिळणारी संपत्ती हडप केली होती, म्हणजे हे दोन जवळचे नातेवाईक, त्यांच्या खोट्या शपथेच्या मुकाबल्यात, आपली शपथ घेतील.
६) हा त्या फायद्याचा उल्लेख आहे, जो याच्या हुकूमांत लपलेला आहे; ज्याचे वर्णन केले गेले आहे. तो हाकी, ही पद्धत अंगिकारण्यामध्ये, ज्यांना मृत्यूपत्र केले गेले आहे ते खरी खरी साक्ष देतील. कारण की त्यांना धोका असेल, की, जर आम्ही काही लबाडी केली किंवा, खोटे बोललो, किंवा हेराफेरीचा अपराध केला, तर या कारवाया स्वत: उलटूं शकतात.

या घटनेच्या अवतरण्याच्या कारणांत, बुदैल बिन अबी मर्यम, ची गोष्ट वर्णन करण्यात येते, की ते सीरियाला व्यापारासाठी गेले. तेथे आजारी पडले आणि मृत्यू पंथाला लागले. त्यांच्याजवळ सामान आणि चांदीचा एक प्याला होता. जो त्यांनी दोन खिस्त्यांच्या हवाली करून, आपल्या नातेवाईकांपर्यंत पोहचविण्याची 'वसिअत' (मृत्यूपत्र) करून दिली. ते मृत्यू पावले. हे दोन्ही 'ज्यांना वसिअत केली गेली होती' जेव्हा परत आले, तर प्याला तर त्यांनी विकून पैसे आपसात वाटून घेतले; आणि बाकी सामान वारसदारांना पोहचवून दिले. सामानांत एक पत्र पण होते, ज्यांच्यात सामानाची यादी होती. ज्याच्या अनुषंगाने चांदीचा प्याला नदारद होता. यांना सांगण्यांत आले तर, त्यांनी खोटी शपथ खाऊन घेतली. परंतु नंतर पत्ता लागला की, तो प्याला त्यांनी अमक्या सराफाला विकला आहे. म्हणून त्यांनी या गैरमुस्लिमांच्या मुकाबल्यात, शपथा खाऊन, प्याल्याची किंमत त्यांच्याकडून वसूल केली. ही रिवायत तर सनदच्या दृष्टीने 'जओफ' आहे. (तिर्मिझी) तथापि दुसऱ्या एका सनदीने, ह.इब्ने अब्बास ﷺ कडून पण थोडक्यांत हे आलेले आहे, ज्याला अल्लामा अल्बानीने, खरे ठरविले आहे. (स.तिर्मिझी)
७) पैगंबर अलैहिमुस्सलामच्या बरोबर त्यांच्या समाजाने जी वागणून, चांगली किंवा वाईट, जी पण केली; त्याचे ज्ञान तर खचित्‌च त्यांना असेल; परंतु ते आपल्या ज्ञानाची जाणीव नसल्याचे, एक तर कयामतच्या दिवसाच्या भयंकर दहशतीमुळे, आणि अल्लाहजल्ले जलालहुच्या मोठेपणा हैबतीने करतील. किंवा याचा संबंध, त्यांच्या मृत्यूनंतरच्या परिस्थितीशी असेल. याशिवाय छुप्या कामांचे ज्ञान तर संपूर्णत: फक्त अल्लाहलाच आहे. यासाठी ते सांगतील की, अदृष्टाचा ज्ञाता तर फक्त तूच आहेस; आम्ही नाही. यावरून ठाऊक झाले की, पैगंबर लोक अदृष्टाचे ज्ञाते नसतात. अदृष्टाचा ज्ञाता फक्त अल्लाहचीच जात आहे. पैगंबरांना जे ज्ञान असते, प्रथम तर त्यांचा संबंध त्या कामांशी असतो, जी पैगंबरीची कर्तव्ये पार पाडण्यासाठी आवश्यक असतात. दुसरे की, हे सुद्धा त्यांना वह्याच्या मार्फत सूचित केले जाते. वास्तविक अदृष्टाचा ज्ञाता तो असतो, ज्याला प्रत्येक वस्तूंचे ज्ञान व्यक्तीगत्‌ असते, कोणाच्या सांगण्याने नाही. आणि ज्याला दाखविल्यानंतर, कोण्या वस्तूंचे ज्ञान प्राप्त होईल, त्याला अदृष्टाचा ज्ञाता म्हटले जात नाही.

إِذۡ قَالَ ٱللَّهُ يَٰعِيسَى ٱبۡنَ مَرۡيَمَ ٱذۡكُرۡ نِعۡمَتِي
عَلَيۡكَ وَعَلَىٰ وَٰلِدَتِكَ إِذۡ أَيَّدتُّكَ بِرُوحِ ٱلۡقُدُسِ
تُكَلِّمُ ٱلنَّاسَ فِي ٱلۡمَهۡدِ وَكَهۡلٗاۖ وَإِذۡ عَلَّمۡتُكَ
ٱلۡكِتَٰبَ وَٱلۡحِكۡمَةَ وَٱلتَّوۡرَىٰةَ وَٱلۡإِنجِيلَۖ وَإِذۡ تَخۡلُقُ
مِنَ ٱلطِّينِ كَهَيۡـَٔةِ ٱلطَّيۡرِ بِإِذۡنِي فَتَنفُخُ فِيهَا
فَتَكُونُ طَيۡرَۢا بِإِذۡنِيۖ وَتُبۡرِئُ ٱلۡأَكۡمَهَ وَٱلۡأَبۡرَصَ
بِإِذۡنِيۖ وَإِذۡ تُخۡرِجُ ٱلۡمَوۡتَىٰ بِإِذۡنِيۖ وَإِذۡ كَفَفۡتُ بَنِيٓ
إِسۡرَٰٓءِيلَ عَنكَ إِذۡ جِئۡتَهُم بِٱلۡبَيِّنَٰتِ فَقَالَ ٱلَّذِينَ
كَفَرُواْ مِنۡهُمۡ إِنۡ هَٰذَآ إِلَّا سِحۡرٞ مُّبِينٞ ١١٠

**जेव्हा की अल्लाहतआला फर्मावेल, हे ईसा बिन मर्यम! माझ्या उपकाराची आठवण करा, जो तुमच्यावर आणि तुमच्या मातोश्रीवर झाला आहे. जेव्हा मी पवित्र आत्मा[१] (म्हणजे जिब्राईल) द्वारे तुझी मदत केली. तुम्ही कुशीत[२] असताना सुद्धा लोकांशी संभाषण करीत होता; आणि प्रौढ वयात सुद्धा.आणि जेव्हा की मी तुम्हास, पुस्तक आणि ज्ञानाच्या गोष्टी, आणि तौरात व इंजीलचे शिक्षण दिले[३]; आणि जेव्हां कीं, तुम्ही माझ्या हुकूमाने चिखलातून एक आकार बनवत असत जसा पक्ष्याचा आकार असतो; मग तुम्ही त्यांत फूंक मारून देत असत ज्यामुळे तो पक्षी बनून जात असे, माझ्या हुकूमाने. आणि तुम्ही, जन्मजात आंधळ्याला, आणि कोडाच्या आजाराला चांगले करून देत असत माझ्या हुकूमाने आणि जेव्हा तुम्ही मृताला जिवंत करून देत होता[४] माझ्या हुकूमाने. आणि जेव्हा मी बनी इस्राईलला तुमच्यापासून दूर ठेवले; जेव्हा तुम्ही त्यांच्याजवळ निशाण्या घेऊन आला होता[५]; मग त्यांच्यातून जे काफिर होते, त्यांनी सांगितले होते की, निव्वळ खुल्या जादूशिवाय, हे काहीही नाही[६] ११०**

१) याच्याने अभिप्रेत ह.जिब्राईल عليه السلام आहेत. जसे की सू.बकर: आ.क्र.८७ मध्ये येऊन चुकले.

२) कुशीत त्या वेळी संभाषण केले, जेव्हा ह.मर्यम, आपल्या नवजात बालकाला घेऊन, आपल्या समाजांत आल्यात. आणि त्यांनी या मुलाला पाहून, आश्चर्याचे प्रदर्शन,आणि चौकशी केली, तेव्हा अल्लाहच्या हुकूमाने, ह.ईसा عليه السلام नी स्तनपानाच्या अवस्थेत, संभाषण केले. आणि मोठ्या वयांत संभाषणाने अभिप्रेत, पैगंबरी मिळाल्यानंतर, आवाहन आणि प्रचार (दावत व तब्लीग) आहे.

३) याचे स्पष्टीकरण सू.आले इमरानच्या आ.क्र.४८ मध्ये येऊन चुकले .

४) या चमत्कारांचे वर्णनपण चर्चित अध्यायाच्या आ.क्र.४९ मध्ये येऊन चुकले आहे.

५) हा इशारा आहे, त्या कारस्थानाकडे, जे यहूद्यांनी ह.ईसा عليه السلام च्या ठार करण्याला आणि सुळी देण्यासाठी रचले होते. ज्याच्यापासून अल्लाहने वाचवून, त्यांना आकाशावर उचलून घेतले होते. कृपया पहावा समास सू.आले इमरान आ.क्र.५४

६) प्रत्येक पैगंबरांचे विरोधक, अल्लाहच्या निशाण्या आणि चमत्कार पाहून; त्यांना जादूच ठरवत राहिले आहेत. वास्तविक जादूगार हात चलाखीचा एक धोका आहे; ज्याच्याशी पैगंबरां عليهم السلام चा काय संबंध असू शकतो? या शिवाय पैगंबरांच्या हातून जाहीर होणारे चमत्कार, सर्व सामर्थ्यवान अल्लाह तबारक वतआला च्या सामर्थ्य आणि शक्तीचे प्रकटीकरण असे; कारण की ते अल्लाहच्याच हुकूमाने, इच्छेने आणि सामर्थ्याने, होत असते. कोण्या पैगंराबराच्या अखत्यारांत हे नव्हते की, तो जेव्हा इच्छेल, अल्लाहच्या हुकूम आणि मर्जीशिवाय, कोणी चमत्कार सादर करून दाखवून देईल. याच करता येथे पण पाहून घ्या की, ह.ईसा عليه السلام च्या प्रत्येक चमत्काराबरोबर अल्लाहने चार वेळा फर्माविले 'बेइज़्नी'की प्रत्येक चमत्कार ''माझ्या हुकूमाने झाला आहे.''हेच कारण आहे की, जेव्हा नबी ﷺ कडे मक्केच्या मुश्रिकांनी, वेगवेगळे चमत्कार दाखविण्याची मागणी केली; ज्याचा तपशिल, सू.बनी इस्राईल आ.क्र.९१ ते ९३ मध्ये वर्णन करण्यात आला आहे. तर याच्या उत्तरांत नबी ﷺ नी हेच सांगितले, ''माझा पालनकर्ता परम पवित्र आहे (म्हणजे तो तर या दौर्बल्यापासून पवित्र आहे की, तो या गोष्टी दाखवू शकणार नाही, तो तर दाखवू शकतो परंतु त्याची बुध्दिमत्ता याला चाहते किंवा नाही? किंवा ज्यावेळी तो इच्छिल? याचे ज्ञान त्यालाच आहे. आणि त्याचप्रमाणे तो निर्णय करतो.) परंतु मी तर फक्त माणूस आणि पैगंबर आहे.'' म्हणजे माझ्यांत हे चमत्कार दाखविण्याची आपल्या वतीने ताकद नाही. तसेच पैगंबरांच्या चमत्कारांचा जादूशी काही संबंध नसतो. जर असे असते तर जादूगारांनी याची तोड प्राप्त करून घेतली असती. परंतु ह.मूसा عليه السلام च्या प्रसंगाने सिद्ध आहे की, जगभरातील जमा झालेले मोठे मोठे जादूगार पण ह.मूसा عليه السلام च्या चमत्कारांची तोड करू शकले नाही; आणि जेव्हां त्यांना चमत्कार आणि जादूतील फरक, स्पष्टपणे ठाऊक होऊन गेला, तर ते मुसलमान होऊन गेले.

وَاِذْ اَوْحَيْتُ اِلَى الْحَوَارِيّٖنَ اَنْ اٰمِنُوْا بِيْ وَبِرَسُوْلِيْ ۚ قَالُوْٓا اٰمَنَّا وَاشْهَدْ بِاَنَّنَا مُسْلِمُوْنَ ﴿١١١﴾

आणि जेव्हा मी हवारींना हुकूम[१] दिला की, तुम्ही माझ्यावर आणि माझ्या पैगंबरावर ईमान आणा; त्यांनी म्हटले की, आम्ही ईमान आणले; आणि आपण साक्ष रहा की, आम्ही पूर्ण आज्ञाधारक आहोत ﴿१११﴾

اِذْ قَالَ الْحَوَارِيُّوْنَ يٰعِيْسَى ابْنَ مَرْيَمَ هَلْ يَسْتَطِيْعُ رَبُّكَ اَنْ يُّنَزِّلَ عَلَيْنَا مَآئِدَةً مِّنَ السَّمَآءِ ۗ قَالَ اتَّقُوا اللّٰهَ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿١١٢﴾

(ती वेळ आठवण करण्यायोग्य आहे,) की जेव्हा हवारींनी सांगितले की हे ईसा बिन मर्यम! काय आपला पालनकर्ता असे करू शकतो की आमच्यावर आकाशातून, काही जेवण उतारून देईल?[२] तुम्ही सांगितले की, अल्लाहला भ्या, जर तुम्ही ईमानवाले आहांत[३] ﴿११२﴾

قَالُوْا نُرِيْدُ اَنْ نَّاْكُلَ مِنْهَا وَتَطْمَئِنَّ قُلُوْبُنَا وَنَعْلَمَ اَنْ قَدْ صَدَقْتَنَا وَنَكُوْنَ عَلَيْهَا مِنَ الشّٰهِدِيْنَ ﴿١١٣﴾

ते म्हणाले की, आम्ही असे इच्छितो की, त्यांच्यातून आम्ही खावे; आणि आमच्या मनाचे पूर्ण समाधान होऊन जावे. आणि आमचा विश्वास आणखी वाढून जावा. की तुम्ही, आम्हाला खरे (खरे) सांगितले आहे; आणि आम्ही साक्ष देणाऱ्यांमधून होऊन जावे ﴿११३﴾

قَالَ عِيْسَى ابْنُ مَرْيَمَ اللّٰهُمَّ رَبَّنَآ اَنْزِلْ عَلَيْنَا مَآئِدَةً مِّنَ السَّمَآءِ تَكُوْنُ لَنَا عِيْدًا لِّاَوَّلِنَا وَاٰخِرِنَا وَاٰيَةً مِّنْكَ ۚ وَارْزُقْنَا وَاَنْتَ خَيْرُ الرّٰزِقِيْنَ ﴿١١٤﴾

ह.ईसा इब्ने मर्यम ने प्रार्थना केली की, हे अल्लाह! आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर आकाशांतून जेवण अवतरीत कर.की ती आमच्यासाठी, म्हणजे आमच्यांत जे प्रथम आहेत, आणि जे आमच्यानंतर आहेत, सर्वांसाठी एक आनंदाची गोष्ट[४] होऊन जावी; आणि तुझ्याकडून एक निशाणी होऊन जावी. आणि तू आम्हास रोजी दे. आणि तू सर्व (रोजी) देणाऱ्यात उत्तम अन्नदाता आहेस ﴿११४﴾

१) 'हवारिय्यीन'ने अभिप्रेत ह.ईसा عليه السلام चे ते अनुयायी आहेत, ज्यांनी त्यांच्यावर ईमान आणले. आणि त्यांचे साथी आणि मददगार बनले. त्यांची संख्या १२ सांगण्यात येते. वह्य' ने अभिप्रेत येथे ती वह्य' नाही, जी देवदूतांच्या मार्फत पैगंबरां السلام वर अवतरीत होत होती. परंतु ही वह्य, अल्लाहकडून मनांत आणलेली गोष्ट आहे. जी अल्लाहकडून, काही लोकांच्या मनांत टाकून दिली जाते. जसे ह.मूसा عليه السلام ची आई, आणि ह.मर्यमला अशाचप्रकारे 'इल्हाम' झाला; ज्याला कुरआनाने वह्य सारखेच संबोधित केले आहे. याच्याने ठाऊक झाले की, ज्या लोकांनी वह्य या शब्दाने हा आधार घेतला आहे की, ह.मूसा عليه السلام ची आई आणि ह.मर्यम عليها السلام पैगंबर होत्या, यासाठी की, त्यांच्यावर सुद्धा अल्लाहतआलाकडून वह्य आली होती, बरोबर नाही. यासाठी की ही वह्य, वह्य इल्हामच होती. जसे येथे, ''अव्हय्यतु इलल् हवारीअीन'' मध्ये आहे. ही पैगंबरीची वह्य नाही.

२) माइदः अशा भांडयाला (तबाक, सैनी, प्लेट किंवा ताट) म्हणतात ज्यांत, जेवण असते. यासाठी 'दस्तरखान' पण यांचे भाषांतर केले जाते. कारण याच्यावर पण जेवण लावण्यात येते. अध्यायाचे नाव पण अनुषंगाने आहे की, याचे वर्णन आहे. हवारीय्यीनने आणखी आपल्या मनाच्या अधिक समाधानासाठी, ही मागणी केली; ज्याप्रमाणे ह.इब्राहीम عليه السلام नी, मृतांना जिवंत करण्याची, प्रत्यक्ष पहाण्याची इच्छा व्यक्त केली होती.

३) म्हणजे हा प्रश्न करू नका, शक्य आहे की, तुमची परीक्षा घेण्याचे साधन बनून जावे. कारण कीं इच्छेप्रमाणे, चमत्कार दाखविल्यानंतर, त्या समाजाकडून ईमानमध्ये दुर्बलता, शिक्षेला कारणीभूत होऊ शकते. यासाठी ह.ईसा عليه السلام नी त्यांना, या मागणीपासून मना केले. आणि त्यांना अल्लाहकडून भिवविले.

४) इस्लामी धर्म शास्त्रात ईदचा हा अर्थ राहिला नाही की, तो सामाजिक सणाचा एक दिवस असावा; ज्याच्यात सर्व चारीत्र्याच्या अटी आणि धर्मशास्त्राचे सर्व संकेत पायदळी तुडवून फारच भोंगळ पद्धतीने, आनंद जाहीर केला जावा. रोषणाई केली जावी आणि उत्सव साजरा केला जावा. जसे की आज काल याची हीच पद्धत समजून घेतली गेली आहे आणि याचप्रमाणे सण साजरे केले जात आहेत. परंतु आकाशी धर्मशास्त्रांत याचा दर्जा एक सामाजिक सोहळ्याचा असतो. ज्याचा महत्त्वाचा उद्देश हा असतो कीं, या दिवशी संपूर्ण समाजाने एकत्रितपणे, अल्लाहतआलाचे आभार मानावेत. आणि त्याच्या मोठ्यापणाचे आणि प्रशंसतेचे गुणगान मोठ्या आवाजाने करावे. येथे पण ह.ईसा عليه السلام नी या दिवसाला ईद बनविण्याची जी इच्छा व्यक्त केली आहे, याने त्यांचा अर्थ हाच आहे की, आम्ही तुझी स्तुती आणि प्रसंशा, महत्ता आणि गौरव करावा. काही बिदअती, या 'ईदे माइदः' ने 'इदे मिलाद' सिद्ध करतात. वास्तविक प्रथम तर आमच्या धर्मशास्त्राच्या पूर्वीच्या धर्मशास्त्राची ही घटना आहे. त्याला जर इस्लामला कायम ठेवावयाचे असते; तर स्पष्टीकरण करून दिले गेले असते. दुसरे असे की, ही पैगंबराकडून 'ईद' बनविण्याच्या इच्छेचे प्रकटन झाले होते; आणि पैगंबर सुद्धा, अल्लाहच्या हुकूमाने, धर्मशास्त्रीय आदेश देणारा असतो. तिसरे ईद जी समजली गेली आणि अर्थ पण तो असतो, जो वरील महावाक्यांमध्ये वर्णन करण्यात आला आहे. जेव्हा कीं, 'ईद मिलाद' मध्ये, यापैकी कुठलीही गोष्ट नाही. म्हणून 'ईदे मिलाद' च्या बिदअत होण्यांत काहीच शंका नाही. इस्लाममध्ये दोनच ईदी आहेत; ज्या इस्लामने नक्की केल्या आहेत. ईदुल् फित्र आणि ईदुल् अजहा. याच्याशिवाय आणखी तिसरी ईद नाही.

قَالَ اللّٰهُ اِنِّيْ مُنَزِّلُهَا عَلَيْكُمْ فَمَنْ يَّكْفُرْ بَعْدُ
مِنْكُمْ فَاِنِّيْۤ اُعَذِّبُهٗ عَذَابًا لَّاۤ اُعَذِّبُهٗۤ اَحَدًا مِّنَ
الْعٰلَمِيْنَ ﴿١١٥﴾ ع ١٥ / ٧ / ٥

**हकतआलाने फर्माविले, की मी ते जेवण तुमच्यावर अवतरीत करणार आहे. मग तुमच्यातून जो मनुष्य, त्याच्या नंतरही मला नाकारित राहील, तर मी त्याला अशी शिक्षा देईन, की साऱ्या जगात तशी शिक्षा मी कोणासही देणार नाही[१] ११५**

وَاِذْ قَالَ اللّٰهُ يٰعِيْسَى ابْنَ مَرْيَمَ ءَاَنْتَ قُلْتَ
لِلنَّاسِ اتَّخِذُوْنِيْ وَاُمِّيَ اِلٰهَيْنِ مِنْ دُوْنِ اللّٰهِ
قَالَ سُبْحٰنَكَ مَا يَكُوْنُ لِيْۤ اَنْ اَقُوْلَ مَا لَيْسَ لِيْ
بِحَقٍّ اِنْ كُنْتُ قُلْتُهٗ فَقَدْ عَلِمْتَهٗ تَعْلَمُ مَا فِيْ نَفْسِيْ
وَلَاۤ اَعْلَمُ مَا فِيْ نَفْسِكَ اِنَّكَ اَنْتَ عَلَّامُ الْغُيُوْبِ ﴿١١٦﴾

**आणि (ती वेळही वर्णन करण्यास योग्य आहे) जेव्हा की अल्लाहतआला फर्मावील, हे ईसा इब्ने मर्यम! काय तुम्ही या लोकांस सांगितले होते की मला आणि माझ्या आईला सुद्धा अल्लाहच्या शिवाय दोन उपास्य ठरवून[२] घ्या! ईसा (अ.) अर्ज करतील, मी तुला परम पवित्र समजतो; मला कुठल्याच प्रकारे, हे योग्य नव्हते की, मी अशी गोष्ट सांगेन, ज्याच्या सांगण्याचा मला कुठलाही हक्क नाही; जर मी सांगितले असेल, तर तुला त्याचे ज्ञान असेल; तू तर माझ्या मनांतील गोष्ट पण जाणतो; आणि मी तुझ्या मनांत जे काही आहे त्याला जाणत नाही[३]; सर्व अदृष्टाचा ज्ञाता तूच आहेस ११६**

مَا قُلْتُ لَهُمْ اِلَّا مَاۤ اَمَرْتَنِيْ بِهٖۤ اَنِ اعْبُدُوا اللّٰهَ
رَبِّيْ وَرَبَّكُمْ وَكُنْتُ عَلَيْهِمْ شَهِيْدًا مَّا دُمْتُ فِيْهِمْ
فَلَمَّا تَوَفَّيْتَنِيْ كُنْتَ اَنْتَ الرَّقِيْبَ عَلَيْهِمْ وَاَنْتَ عَلٰى
كُلِّ شَيْءٍ شَهِيْدٌ ﴿١١٧﴾

**मी तर त्यांना आणखी काही सांगितले नाही; परंतु तेच जे तू मला सांगण्याला फर्माविले होते की तुम्ही अल्लाहची भक्ती करा, जो माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचाही[४] पालनकर्ता आहे. मी त्यांच्यावर नजर ठेवित होतो, जोपर्यंत त्यांच्यात राहिलो. मग जेव्हा तू मला उचलून घेतले, तर तूच त्यांचा निरीक्षक होता. आणि[५] तू प्रत्येक गोष्टीचे पूर्ण ज्ञान बाळगतो ११७**

اِنْ تُعَذِّبْهُمْ فَاِنَّهُمْ عِبَادُكَ وَاِنْ تَغْفِرْ لَهُمْ فَاِنَّكَ
اَنْتَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿١١٨﴾

**जर तू यांना शिक्षा देशील तर हे तुझे सेवक आहेत, आणि जर तू त्यांना क्षमा करून टाकशील तर तू सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहेस[६] ११८**

قَالَ اللّٰهُ هٰذَا يَوْمُ يَنْفَعُ الصّٰدِقِيْنَ صِدْقُهُمْ
لَهُمْ جَنّٰتٌ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَاۤ
اَبَدًا رَضِيَ اللّٰهُ عَنْهُمْ وَرَضُوْا عَنْهُ ذٰلِكَ الْفَوْزُ
الْعَظِيْمُ ﴿١١٩﴾

**अल्लाहतआला फर्मावील, हा तो दिवस आहे की, जे लोक खरे होते, त्यांचे खरे होणे त्यांना कामी येईल[७]. त्यांना बागा मिळतील, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात असतील; ज्यांच्यामध्ये ते हमेशा हमेशा (नित्य नेहमी) राहतील. अल्लाहतआला त्यांच्याशी राजी आणि खूष. आणि हे अल्लाहतआलाशी राजी आणि खूष. हे फारच मोठे साफल्य आहे ११९**

لِلّٰهِ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا فِيْهِنَّ وَهُوَ عَلٰى
كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿١٢٠﴾ ع ١٦ / ٥ / ٦

**आकाश आणि पृथ्वीचे राज्य अल्लाहचेच आहे. आणि त्या वस्तूंचे, (ही) ज्या यांच्यात आहेत. आणि तो प्रत्येक गोष्टीवर पूर्ण सामर्थ्य बाळगतो १२०**

१) हे माइदः (जेवणाचे ताट) आकाशांतून उतरले किंवा नाही? याबाबत कोणतीही सहीह आणि जाहीर (खुल्लम् खुल्ला) हदीस नाही. बहुतेक धर्मपंडित (इमाम शौकानी आणि इमाम इब्ने जरीर तबरीसह) याच जेवणाच्या ताटाच्या अवतरणास (कायल) मानणारे आहेत. आणि त्यांचा आधार कुरआनचे शब्द ''इन्नी मुनज्जी लुहा अलैकुम'' ने आहे. कीं हा अल्लाहचा वायदा आहे; जो खचितच् खरा आहे. परंतु त्याला अल्लाहकडून निश्चित वायदा ठरविणे, यासाठी बरोबर वाटत नाही. कीं, पुढचे शब्द 'फमन् यक्फुर्' या वायद्याला सशर्त होण्याचे जाहीर करतात. म्हणजे दुसरे उलमा म्हणतात कीं, अल्लाहतआलाकडून ही शर्त ऐकून त्यांनी म्हटले कीं मग आम्हाला त्याची जरूरी नाही. त्यानंतर त्याचे अवतरण झाले नाही. इमाम इब्ने कसीरने सहाबांच्या رضي الله عنهم म्हणण्यांना ज्या इमाम मुजाहिद आणि ह. हसन बिन बसरी कडून सांगण्यात आल्या आहेत, याला बरोबर ठरविले आहे. तसेच म्हटले आहे की, या सहाबांच्या म्हणण्याचे (आसार) समर्थन, या गोष्टीने पण होते की जेवणाच्या ताटाच्या उतरण्याची प्रसिद्धी, खिस्त्यांत नाही, की त्यांच्या

पुस्तकांत उल्लेख नाही. वास्तविक जर हे अवतरीत झाले असते; तर त्यांच्यांत प्रसिद्धी पण मिळावयास हवी होती. आणि पुस्तकांत सुद्धा विस्ताराने किंवा कमीत कमी थोडक्यांत नोंद व्हावयास पाहिजे होती.

२) हा प्रश्न कयामतच्या दिवशी विचारला जाईल. आणि याचा उद्देश, अल्लाहला सोडून, आणखी कोणाला उपास्य बनवून, घेण्याऱ्यांची कान उघाडणी आहे; कीं ज्यांना तुम्ही उपास्य आणि इच्छापूर्ती करणारे समजत होता, ते तर स्वत:च अल्लाहच्या दरबारांत उत्तरदायी आहेत. दुसरी गोष्ट ही ठाऊक झाली कीं, खिस्त्यांनी, ह.मसीह عليه السلام च्या बरोबर ह.मर्यमला पण उपास्य बनवले आहे. तिसरी गोष्ट ही ठाऊक झाली कीं, ''मिन् दूनिल्लाह'' (अल्लाहच्या शिवाय उपास्य) ते नाहीत, ज्यांना बहुदेववाद्यांनी, दगड किंवा लाकडाच्या मूर्तींच्या स्वरूपांत बनवून, त्यांची पूजा केली; ज्याप्रमाणे की आजकालचे कबरपूजक उल्मा, आपल्या सामान्यजनांना असा विश्वास देऊन धोका देतात. परंतु ते अल्लाहचे नेक बंदेपण, 'मिन् दूनिल्लाह्' मध्ये शामिल आहेत, ज्यांची लोकांनी कुठल्याही स्वरूपांत उपासना केली. जशी ह.ईसा عليه السلام आणि ह.मर्यम عليها السلام चीखिस्त्यांनी केली.

३) ह.ईसा عليه السلام किती स्पष्ट शब्दांत आपल्या बाबतीत अदृष्टाच्या ज्ञानाचे खंडन करीत आहेत.

४) ह.ईसा عليه السلام नी एकेश्वरवादाचे आणि (आपल्या) पालनकर्त्याच्या भक्तीचे आवाहन, स्तनपान करण्याच्या काळांत पण दिले, जसे की सू.मर्यममध्ये आहे. आणि तारूण्यात आणि प्रौढावस्थेत ही दिले.

५) 'तवफ्फय तनी' चा अर्थ आहे, जेव्हा तू मला जगांतून उचलून घेतलेस, जसे कीं, याचा खुलासा सू.आले इमरान आ. ५५ मध्ये येऊन चुकला आहे. याच्याने ही गोष्ट पण ठाऊक झाली की, पैगंबरांना तेवढेच ज्ञान असते; जेवढे अल्लाहकडून त्यांना देण्यात येते. किंवा ज्याचा प्रत्यय ते आपल्या जीवनांत, आपल्या डोळ्यांनी घेतात. याचे शिवाय त्यांना कोण्या गोष्टीचे ज्ञान नसते. जेव्हा की, अदृष्टाचा ज्ञाता तो असतो, ज्याला कोणी दाखविल्याशिवाय, प्रत्येक वस्तुचे ज्ञान असते. आणि त्याचे ज्ञान, आरंभापासून अंतापर्यंत आहे. हे ज्ञानाचे वैशिष्टय, अल्लाहशिवाय कोणातच नाही. म्हणून अदृष्टाचा ज्ञाता फक्त एका अल्लाहचीच जात आहे. त्याच्याशिवाय कुणीही अदृष्टाचा ज्ञाता नाही. हदीस मध्ये येते की, हशरच्या मैदानांत, नबी ﷺ कडे आपले काही अनुयायी येऊ लागतील तर देवदूत त्यांना पकडून दुसरीकडे घेऊन जातील. आपण ﷺ फर्मावतील त्यांना येऊ द्या; ते तर माझे उम्मती आहेत. देवदूत आपण ﷺ ला सांगतील की, ''(ह.मुहम्मद ﷺ!) आपणांस ठाऊक नाही की, आपल्यानंतर त्यांनी धर्मात कोणकोणत्या बिदअती शोधून काढल्या.'' जेव्हा आपण हे ऐकाल तर आपण ﷺ नी म्हटले, मी पण त्यावेळी हेच म्हणेन, जे पुण्यावन सेवक म्हणजे ह.ईसा عليه السلام नी म्हटले. मी त्यांच्यावर साक्षी राहिलो जोपर्यंत मी त्यांच्यात राहिलो. मग जेव्हा तू मला उचलून घेतले, तर तूच त्यांचा देखरेख करणारा राहिला (स.बुखारी तफसीर सू.माइद: व किताबुल अंबिया. स.मुस्लीम)

६) म्हणजे अर्थ हा कीं, हे अल्लाह! त्यांचा मामला, तुझ्या मर्जीच्या आधीन अहे. यासाठी कीं 'तू जे इच्छितो ते करू शकतो' असा पण आहेस आणि तुला कोणी विचारणारा पण नाही. ''अल्लाह जे काही करतो, त्याची विचारपूस होणार नाही. लोकांची त्यांच्या कामाबाबत विचारपूस होईल.'' (सू. अंबिया-२३) जणू या महावाक्यांत अल्लाहच्या समोर सेवकाची नम्रता आणि लाचारीचे प्रदर्शन पण आहे; आणि अल्लाहची महत्ता आणि ज्ञान, आणि त्याचे सर्व सामर्थ्य आणि सर्वांचा मालक होण्यांचे वर्णन सुद्धा आहे आणि मग या दोन्ही गोष्टींच्या हवाल्याने, क्षमा आणि माफीची विनवणी सुद्धा. सुबहानल्लाह्! किती विचित्र आणि सर्वसमावेशक महावाक्य आहे. याचसाठी हदीसमध्ये येते कीं, एका रात्री,नबी ﷺ वर नफील नमाजीमध्ये, या महावाक्याला पढताना, अशी स्थिती होऊन गेली की, वारंवार प्रत्येक रकातमध्ये यालाच पढत राहिले, येथपावेतो की, सकाळ होऊन गेली. (मुसनद अहमद जि.पृ.१४९)

७) ह.इब्ने अब्बास رضي الله عنه याचा अर्थ हा वर्णन करतात की, ''तो दिवस असा असेल कीं, फक्त एकेशवरवादच (अल्लाहच्या एक) तौहिदवाल्यांना (मोमिनांना) (अल्लाहला एक मानणारे) नफा पोहचवील; म्हणजे शिर्क वाल्यांची माफी आणि क्षमा करण्याचा, कुठलाही प्रकार नसेल.

# (६) सू. अन्आम

महावाक्ये १६५ | रुकूअ २०

(٦) سُوْرَةُ الْاَنْعَامِ مَكِّيَّةٌ (٥٥) | اٰيَاتُهَا ١٦٥ | رُكُوْعَاتُهَا ٢٠

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

اَلْحَمْدُ لِلّٰهِ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَ الْاَرْضَ وَجَعَلَ الظُّلُمٰتِ وَ النُّوْرَ ۬ ثُمَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا بِرَبِّهِمْ يَعْدِلُوْنَ ①

**सर्व स्तुती अल्लाहलाच योग्य आहे, ज्याने आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले. आणि अंध:कार आणि प्रकाशाला बनविले[१]. तरी सुद्धा काफिर लोक, आपल्या पालनकर्त्याबरोबर (इतरांना) उपास्य ठरवितात[२] ①**

هُوَ الَّذِيْ خَلَقَكُمْ مِّنْ طِيْنٍ ثُمَّ قَضٰۤى اَجَلًا ؕ وَ اَجَلٌ مُّسَمًّى عِنْدَهٗ ثُمَّ اَنْتُمْ تَمْتَرُوْنَ ②

**तो असा आहे, ज्याने तुम्हाला मातीतून निर्माण केले[३]. मग एक वेळ निश्चित केला.[४] आणि दुसरा निश्चित वेळ खास अल्लाहच्याच जवळ आहे[५]. तरी सुद्धा तुम्ही शंका घेतात[६] ②**

وَهُوَ اللّٰهُ فِي السَّمٰوٰتِ وَ فِي الْاَرْضِ ؕ يَعْلَمُ سِرَّكُمْ وَجَهْرَكُمْ وَيَعْلَمُ مَا تَكْسِبُوْنَ ③

**आणि तोच आहे खराखुरा उपास्य, आकाशांत सुद्धा आणि पृथ्वीत सुद्धा. तो तुमच्या गुप्त स्थितीला पण, आणि उघड स्थितीला पण जाणतो. आणि तुम्ही जे काही कर्म करीत आहात[७], त्याला पण जाणतो ③**

१) अंध:काराने रात्रीचा अंधार, आणि नूरने दिवसाचा प्रकाश, किंवा 'कुफ्र' चा अंध:कार आणि ईमानचा प्रकाश अभिप्रेत आहे. प्रकाशाच्या तुलनेत अंध:काराला अनेक वचनांत वर्णन करण्यात आले आहे. याकरीता कीं अंधाराचे सबब पण पुष्कळ आहेत. आणि त्याचे प्रकार पण फारच आहेत. असे पण असू शकते की, जसे की, मार्गदर्शन आणि ईमानचा मार्ग एकच आहे चार किंवा पांच किवा असंख्य नाहीत. म्हणून नूरला एकच सांगण्यात आले.

२) म्हणजे याच्या बरोबर दुसऱ्यांना सरकतदार ठरवितात.

३) म्हणजे तुमचे वडील आदम عليه السلام ला, जे तुमचे मूळ आहेत, आणि ज्यांच्यापासून तुम्ही सर्व निघाला आहात; याचा एक दुसरा अर्थ हा पण निघूंशकतो कीं, तुम्ही जे अन्न खातात, सर्व जमिनीपासून निर्माण होते; आणि त्याच अन्नापासून विर्य बनते, जे आईच्या गर्भाशयात जाऊन, मनुष्य निर्मितीला कारणीभूत होते. या दृष्टीकोनातून, जणूं तुमचा जन्म, मातीतून झाला.

४) म्हणजे मृत्यूचा वेळ.

५) म्हणजे कयामतच्या वेळेचे, त्याचे ज्ञान फक्त अल्लाहलाच आहे. जणू पहिल्या अजलने अभिप्रेत जन्मापासून ते मृत्यूपर्यंत मनुष्याचे आयुष्य आहे. आणि दुसऱ्या अजल ने अभिप्रेत मनुष्याच्या मृत्यूपासून ते कयामत घटण्यापर्यंत या दुनियेतील सर्व आयुष्य आहे. ज्याच्यानंतर ती ऱ्हास आणि नष्ट पावेल. आणि एक दुसरे जग, म्हणजे परलोकातील जीवनाचा आरंभ होऊन जाईल.

६) म्हणजे कयामतच्या येण्यात, जसे की काफिर आणि मुशरिक म्हणत असत की जेव्हा आम्ही मरून मातीत मिसळून जाऊ, तर कशाप्रकारे आम्हाला दुसऱ्यांदा जिवंत केले जाईल ? अल्लाहतआलाने म्हटले, ज्याने तुम्हास पहिल्यांदा निर्माण केले, दुसऱ्यांदा पण तोच अल्लाहतआला तुम्हांस जिवंत करील (सू.यासीन)

७) अहले सुन्नत म्हणजे सलफ ची श्रद्धा (अकीदा) आहे की, अल्लाहतआला स्वत:तर अर्ष (सिंहासना) वर आहे; ज्याप्रमाणे त्याच्या प्रतिष्ठेला योग्य आहे. परंतु आपल्या ज्ञानाच्या दृष्टीकोनातून प्रत्येक ठिकाण म्हणजे त्याचे ज्ञान आणि माहितीच्या बाहेर नाही. तथापि काही मार्गभ्रष्ट पंथ, अल्लाहतआलाला अर्षवर मानीत नाही. आणि म्हणतात की, अल्लाहतआला प्रत्येक ठिकाणी उपस्थित आहे. आणि ते या महावाक्याने आपल्या या श्रद्धेला आधार घेतात. परंतु हा अकिदा ज्याप्रमाणे चूक आहे, हा पुरावा पण  बरोबर नाही. महावाक्याचा अर्थ हा आहे की, ती जात जिला आकाश आणि पृथ्वीत अल्लाह म्हणून संबोधित केले जाते; आणि आकाश आणि पृथ्वीत ज्याचे आधिपत्य आहे, आणि आकाश आणि पृथ्वीत ज्याला खराखुरा उपास्य समजले जाते आणि मानले जाते. तो अल्लाह तुमचे गुप्त आणि जाहीर आणि जी काही कर्मे तुम्ही करतात, सर्वांना तो जाणतो. (फतहुल कदीर)

وَمَا تَاْتِيْهِمْ مِّنْ اٰيَةٍ مِّنْ اٰيٰتِ رَبِّهِمْ اِلَّا كَانُوْا
عَنْهَا مُعْرِضِيْنَ ٤

आणि त्यांच्याजवळून कोणी निशाणीपण, त्यांच्या पालनकर्त्याच्या निशाण्यांमधून येत नाही, परंतु ते तिच्यापासून तोंडच फिरवतात ④

فَقَدْ كَذَّبُوْا بِالْحَقِّ لَمَّا جَآءَهُمْ ۭ فَسَوْفَ
يَاْتِيْهِمْ اَنْۢبٰۗؤُا مَا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ٥

त्यांनी या खऱ्या पुस्तकाला पण खोटे ठरविले; जेव्हा की, ते त्यांच्याजवळ पोहचले; तर लवकरच त्यांना ठाऊक होऊन जाईल, या गोष्टींबाबत, ज्याची ते टिंगल करीत होते[१] ⑤

اَلَمْ يَرَوْا كَمْ اَهْلَكْنَا مِنْ قَبْلِهِمْ مِّنْ قَرْنٍ مَّكَّنّٰهُمْ
فِي الْاَرْضِ مَا لَمْ نُمَكِّنْ لَّكُمْ وَاَرْسَلْنَا السَّمَآءَ
عَلَيْهِمْ مِّدْرَارًا ۠ وَّجَعَلْنَا الْاَنْهٰرَ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهِمْ
فَاَهْلَكْنٰهُمْ بِذُنُوْبِهِمْ وَاَنْشَاْنَا مِنْۢ بَعْدِهِمْ قَرْنًا
اٰخَرِيْنَ ٦

काय त्यांनी पाहिले नाही, की आम्ही त्यांच्यापूर्वी कित्येक समूहांना नष्ट करून चुकलो आहोत; ज्यांना आम्ही जगात असे सामर्थ्य दिले होते, की तुम्हांस तसे सामर्थ्य दिले नाही. आणि आम्ही त्यांच्यावर खूप वर्षा केली. आणि आम्ही त्यांच्या खालून (पाण्याचे) पाट वाहविले; मग आम्ही त्यांना त्यांच्या अपराधांबद्दल नष्ट करून टाकले[२]; आणि त्यांच्यानंतर दुसऱ्या समूहांना निर्माण करून टाकले[३] ⑥

وَلَوْ نَزَّلْنَا عَلَيْكَ كِتٰبًا فِيْ قِرْطَاسٍ فَلَمَسُوْهُ
بِاَيْدِيْهِمْ لَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْٓا اِنْ هٰذَآ اِلَّا سِحْرٌ
مُّبِيْنٌ ٧

आणि जर आम्ही, कागदावर लिहिलेले कोणी पुस्तक आपल्यावर, अवतरीत करतो, मग हे लोक आपल्या हातांनी (त्याला) स्पर्शपण करून घेते; तरी पण हे काफिर लोक हेच म्हणते, हे काहीच नाही; परंतु निव्वळ जादू आहे[४] ⑦

وَقَالُوْا لَوْلَآ اُنْزِلَ عَلَيْهِ مَلَكٌ ۭ وَلَوْ اَنْزَلْنَا مَلَكًا لَّقُضِيَ
الْاَمْرُ ثُمَّ لَا يُنْظَرُوْنَ ٨

आणि हे लोक असे म्हणतात की, त्यांच्याजवळ कोण्या देवदूताला का पाठविण्यांत आले नाही ? आणि जर आम्ही कोणी देवदूत पाठविला असता तर सारा मामलाच खलास झाला असता;मग त्यांना जरा पण संधी दिली नसती[५] ⑧

وَلَوْ جَعَلْنٰهُ مَلَكًا لَّجَعَلْنٰهُ رَجُلًا وَّلَلَبَسْنَا عَلَيْهِمْ
مَّا يَلْبِسُوْنَ ٩

आणि जर आम्हाला देवदूत पाठवायचा असता, तर आम्ही त्याला माणूसच बनविले असते; आणि आमच्या या कृतीने पुन्हा त्यांच्यावर तीच भ्रांती झाली असती; जी आता भ्रांती करीत आहे[६] ⑨

وَلَقَدِ اسْتُهْزِئَ بِرُسُلٍ مِّنْ قَبْلِكَ فَحَاقَ بِالَّذِيْنَ
سَخِرُوْا مِنْهُمْ مَّا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ١٠

ع ١ ١٠ ٧

आणि खरोखर आपल्यापूर्वी जे पैगंबर होऊन गेले आहेत; त्यांच्याबरोबर पण उपहास केला जाऊन चुकला आहे. मग ज्या लोकांनी त्यांचा उपहास केला, त्यांना त्या शिक्षेने येऊन घेरले, ज्याची ते थट्टा करीत होते ⑩

१ ع १० ७

قُلْ سِيْرُوْا فِي الْاَرْضِ ثُمَّ انْظُرُوْا كَيْفَ كَانَ
عَاقِبَةُ الْمُكَذِّبِيْنَ ١١

आपण सांगून टाका की जरा जमिनीत चला फिरा. मग पाहून घ्या की, खोटे ठरवणाऱ्यांचा काय परिणाम झाला ⑪

قُلْ لِّمَنْ مَّا فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۭ قُلْ لِّلّٰهِ ۭ كَتَبَ
عَلٰي نَفْسِهِ الرَّحْمَةَ ۭ لَيَجْمَعَنَّكُمْ اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ لَا رَيْبَ
فِيْهِ ۭ اَلَّذِيْنَ خَسِرُوْٓا اَنْفُسَهُمْ فَهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ١٢

आपण सांगून टाका की, जे काही आकाश आणि पृथ्वीत आहे, हे कोणाच्या मालकीचे आहे? आपण सांगून टाका की हे सर्व अल्लाहच्याच मालकीचे आहे. अल्लाहने दया करणे, आपल्यावर आवश्यक ठरवून घेतले आहे[७]. तुम्हास अल्लाह कयामतच्या दिवशी एकत्र गोळा करील, यांत काहीच शंका नाही. जे लोक आपणच आपले नुकसान करीत आहे, ते तर ईमान आणणार नाही ⑫

१) म्हणजे या तोंड फिरवण्याचा आणि खोटे ठरविण्याचा (अल्लाहकडून) प्रकोप त्यांना पोहोचेल. त्यावेळी त्यांना जाणिव होईल की, अरेरे! आम्ही या खऱ्या पुस्तकाला खोटे ठरविले नसते आणि त्याची टिंगल केली नसती, तर किती बरे झाले असते!

२) म्हणजे जेव्हा अपराधाच्या परिणामांत तुमच्या पूर्वीच्या समूहांना आम्ही नष्ट करून चुकलो आहोत. वास्तविक पाहतां, ते शक्ती आणि सामर्थ्यांत तुमच्यापेक्षाही किती तरी जास्त होते. आणि समृद्धता आणि रोजीच्या मुबलकतेतसुद्धा तुमच्यापेक्षा वरचढ होते. तर तुम्हाला नष्ट करणे, आम्हाला काय कठीण आहे? यावरून हे पण ठाऊक झाले की, कोण्या समाजाची केवळ भौतिक प्रगती आणि समृद्धतेने असे समजू नये की, ते फार यशस्वी आणि सफल आहेत. हे तर ढिल देण्याचे ते प्रकार आहेत; जे परीक्षा म्हणून अल्लाहतआला समाजांना देत असतो. परंतु

जेव्हा ही कर्मांची सूट संपून जाते, तर मग त्यांना या साऱ्या प्रगती आणि समृद्धता त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वाचविण्यात यशस्वी होत नाहीत.
३) कारण की, त्यांना पण मागील समाजाप्रमाणे आजमावावे.
४) हे त्यांच्या गर्व द्धेष आणि अहंकाराचे जाहीर करणे आहे की, अल्लाहच्या इतक्या स्पष्ट पुस्तकाचे असून सुद्धा ते याला मानावयास तयार होणार नाहीत. आणि त्याला एका जादूगिरीचे कर्तृत्व ठरवतील. जसे कुरआन मजीदच्या दुसऱ्या जागी सांगण्यात आले आहे, ''जर आम्ही त्यांच्यावर आकाशाचा कोणी दरवाजा उघडून देऊ, आणि हे त्यांच्यातून चढू पण लागतील, तेव्हा सुद्धा म्हणतील, आमचे डोळे निशाधुंद होऊन गेले आहेत; किंबहुना आमच्यावर जादू करून देण्यात आला आहे.'' (सू. हिज्र १४-१५) ''आणि जर ते आकाशातून पडणारा तुकडा जरी पाहून घेतील, तर म्हणतील हे एकावर एक ढग आहेत.'' (सू. तूर-४४) म्हणजे अल्लाहच्या शिक्षेची कुठली ना कुठली कारणे सांगतात ज्याच्यात अल्लाहच्या मर्जीचा कुठलाही हस्तक्षेप त्यांना मान्य करावा लागू नये. वास्तविक विश्वात जे काही पण होते त्याच्याच मर्जीने होते.
५) अल्लाहतआलाने मानवांच्या मार्गदर्शनासाठी, जितकेपण पैगंबर पाठविले, ते माणसांमधूनच होते. आणि प्रत्येक समाजांतून त्याच्या एका व्यक्तीला 'वह्य' आणि पैगंबरी दिली जात असे. हे यासाठी की, याच्याशिवाय कोणी पैगंबर प्रचार आणि आवाहनाचे कर्तव्य पारच पाडू शकत नव्हता. उदाहरणार्थ जर देवदूतांना अल्लाहतआला पैगंबर बनवून पाठवता, तर एक तर ते मानवाच्या भाषेत संभाषण करू शकले नसते. दुसरे ते मानवी भावनांशी अपरिचित असल्याच्या कारणाने, माणसांच्या वेगवेगळ्या परिस्थितीत, निरनिराळ्या अवस्था आणि भावना समजण्यास सुद्धा ते असमर्थ राहिले असते. अशा परिस्थितीत मार्गदर्शनाचे कर्तव्य कशाप्रकारे पार पाडू शकले असते? यासाठी अल्लाहतआलाचा मानवांवर एक फार मोठा उपकार आहे की, त्याने माणसांनाच पैगंबर बनविले. म्हणूनच अल्लाहतआलाने सुद्धा याला एक उपकार म्हणूनच कुरआन करीममध्ये वर्णिले आहे. ''अल्लाहतआलाने मोमिनावर उपकार केला की, त्यांच्यातूनच एका मनुष्याला पैगंबर बनवून पाठविले'' (सू. आले इमरान - १६४) परंतु पैगंबराचे मनुष्य असणे, काफिरांसाठी आश्चर्यजनकच राहिले. ते समजत असत की, पैगंबर मनुष्यांतून नाही, देवदूतांतून असावयास पाहिजे. जणू त्यांचे जवळ मनुष्यत्व पैगंबरासाठी प्रतिष्ठीत आणि लायक नव्हते. जसे की आजकालचे अहले बिदअतपण असेच समजतात. कुफ्र आणि शिर्क वाले, पैगंबरांच्या मनुष्यत्वाला नाकारू शकत नव्हते, कारण ते त्यांच्या घराणे, वंश प्रत्येक गोष्टीला जाणत होते. परंतु पैगंबरीचा ते इन्कार करीत राहिले. जेव्हा की आजकालचे अहले बिदअत पैगंबरीचा इन्कार तर करीत नाही; परंतु मनुष्यत्वाला पैगंबरीच्या विरूद्ध समजण्यामुळे पैगंबरांच्या मनुष्यत्वाचा इन्कार करतात. तथापि अल्लाहतआला या महावाक्यांत फर्मावित आहे की, जर आम्ही काफिरांच्या मागणीवर कोण्या देवदूताला पैगंबर बनवून पाठविले असते किंवा या रसूल ﷺ च्या मान्यतेसाठी आम्ही कोणी देवदूत अवतरीत केला असता, (जसे की येथे हीच गोष्ट वर्णन करण्यांत आली आहे.) आणि मग ते यावर ईमान न आणते, तर त्यांना सवलत दिल्याशिवाय, नष्ट करून टाकले गेले असते.
६) म्हणजे जर आम्ही, देवदूतालाच पैगंबर बनवून पाठविण्याचा निर्णय केला असता, तर उघड गोष्ट आहे की, तो देवदूताच्या मूळ स्वरूपांत येऊ शकत नव्हता. कारण यामुळे मानव त्यांच्याशी भ्याला असता, आणि जवळ येणे आणि परिचित होण्याऐवजी, दूर पळाला असता. म्हणून अशक्य होते की, त्याला मानवी रूपांत पाठविले गेले असते. परंतु तुमचे हे पुढारी ज्यांनी मग पुन्हा हाच आक्षेप, शंका, पुढे केली असती की, हा तर मनुष्यच आहे. जो आता सुद्धा तो पैगंबराच्या मनुष्यत्वाच्या हवाल्याने, सादर केला जात आहे. तर मग देवदूताला पाठविण्याचा काय फायदा ?
७) ज्याप्रमाणे हदीसमध्ये नबी ﷺ नी सांगितले, ''जेव्हा अल्लाहतआलाने सृष्टीला निर्माण केले, तर अर्षवर हे लिहून दिले, ''इन्न रहमती तग्‌लिबु गजबी'' 'खचितच माझी दया, माझ्या प्रकोपावर वरचढ आहे.'' (स.बुखारी, स. मुस्लिम) परंतु ही दया कयामतच्या दिवशी, फक्त ईमानवाल्यांसाठी असेल. काफिरांसाठी अल्लाह फारच प्रकोपित (क्रोधांकीत) होईल. अर्थ असा की, या जगांत तर त्याची दया खचित्‌च सर्वांसाठी आहे; ज्याच्याने मोमिन आणि काफिर, सात्विक आणि गुन्हेगार, आज्ञाधारक आणि आज्ञांभजक सर्वांनाच फायदा पोहोचत आहे. अल्लाहतआला कोण्याही माणसाची रोजी, आज्ञाभंगाच्या कारणाने बंद करीत नाही. परंतु त्याच्या दयेने हे सर्वांसाठी असणे, फक्त जगापुरते मर्यादित आहे. परलोकांत की जे कर्मांचा मोबदला मिळण्याचे ठिकाण आहे; तेथे अल्लाहच्या न्याय निष्ठुरतेच्या वैशिष्टयांचे संपूर्ण दर्शन होईल. ज्याच्या परिणामांत ईमानवाले, दयेच्या छत्रछायेखाली जागा पावतील, आणि काफिर व आज्ञाभंजक नरकाग्नीच्या कयामतच्या शिक्षेचे हक्कदार ठरतील. याचसाठी कुरआनांत सांगण्यात आले आहे, ''आणि माझी कृपादृष्टी सर्व वस्तूंना घेरून आहे. ती कृपादृष्टी, त्या लोकांच्या नावे अवश्य लिहीन जे अल्लाहला भितात आणि जकात देतात आणि जे आमच्या महावाक्यांवर ईमान आणतात.'' (सू. आअराफ १५६)

وَلَهُ مَا سَكَنَ فِي الَّيْلِ وَالنَّهَارِ ؕ وَهُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿١٣﴾

आणि अल्लाहचेच आहे ते सर्व काही, जे रात्रीत आणि दिवसात वसते आहे. आणि तोच मोठा ऐकणारा आणि जाणणारा आहे (१३)

قُلْ اَغَيْرَ اللّٰهِ اَتَّخِذُ وَلِيًّا فَاطِرِ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَهُوَ يُطْعِمُ وَلَا يُطْعَمُ ؕ قُلْ اِنِّيْۤ اُمِرْتُ اَنْ اَكُوْنَ اَوَّلَ مَنْ اَسْلَمَ وَلَا تَكُوْنَنَّ مِنَ الْمُشْرِكِيْنَ ﴿١٤﴾

आपण सांगा की, काय अल्लाहच्या शिवाय, जो की आकाश आणि पृथ्वीचा निर्माणकर्ता आहे, आणि जो खाण्यासाठी देतो, आणि त्याला कोणी खावयास देत नाही, आणखी कोणाला मी उपास्य ठरवू?[१] आपण सांगून टाका की मला तर ही आज्ञा झाली आहे की, सर्वांत प्रथम मी इस्लामला कबूल करावे. आणि तुम्ही मुशरिकीन (शिर्क करणारे) मधून कधीच होऊ नये (१४)

قُلْ اِنِّيْۤ اَخَافُ اِنْ عَصَيْتُ رَبِّيْ عَذَابَ يَوْمٍ عَظِيْمٍ ﴿١٥﴾

आपण सांगून टाका की, जर मी माझ्या पालनकर्त्याचे म्हणणे मान्य करणार नाही.तर मी एका मोठ्या दिवसाच्या शिक्षेपासून भितो[२] (१५)

مَنْ يُّصْرَفْ عَنْهُ يَوْمَئِذٍ فَقَدْ رَحِمَهٗ ؕ وَذٰلِكَ الْفَوْزُ الْمُبِيْنُ ﴿١٦﴾

ज्या माणसापासून त्या दिवशी ती शिक्षा त्याच्यावरून काढून टाकली जाईल; तर त्याच्यावर अल्लाहने मोठीच दया केली. आणि हे खुल्लम खुल्ला साफल्य आहे[३] (१६)

وَاِنْ يَّمْسَسْكَ اللّٰهُ بِضُرٍّ فَلَا كَاشِفَ لَهٗۤ اِلَّا هُوَ ؕ وَاِنْ يَّمْسَسْكَ بِخَيْرٍ فَهُوَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿١٧﴾

आणि तुला अल्लाहतआला काही त्रास पोहचवेले तर त्याला दूर करणारा, अल्लाहतआला शिवाय आणखी कोणी नाही. आणि जर अल्लाहतआला तुला काही फायदा पोहचवील, तर तो प्रत्येक वस्तुवर पूर्ण सामर्थ्य बाळगणारा आहे[४] (१७)

وَهُوَ الْقَاهِرُ فَوْقَ عِبَادِهٖ ؕ وَهُوَ الْحَكِيْمُ الْخَبِيْرُ ﴿١٨﴾

आणि तोच अल्लाह आपल्या सेवकांवर प्रबळ सत्ताधारी आहे[५]; आणि तोच मोठा बुद्धीमान आणि पूर्ण खबरदार आहे (१८)

قُلْ اَيُّ شَيْءٍ اَكْبَرُ شَهَادَةً ؕ قُلِ اللّٰهُ ۙ شَهِيْدٌۢ بَيْنِيْ وَبَيْنَكُمْ ۚ وَاُوْحِيَ اِلَيَّ هٰذَا الْقُرْاٰنُ لِاُنْذِرَكُمْ بِهٖ وَمَنْۢ بَلَغَ ؕ اَئِنَّكُمْ لَتَشْهَدُوْنَ اَنَّ مَعَ اللّٰهِ اٰلِهَةً اُخْرٰى ؕ قُلْ لَّاۤ اَشْهَدُ ۚ قُلْ اِنَّمَا هُوَ اِلٰهٌ وَّاحِدٌ وَّاِنَّنِيْ بَرِيْٓءٌ مِّمَّا تُشْرِكُوْنَ ﴿١٩﴾

आपण यांना विचारा की, सर्वांत मोठा साक्ष देणारा कोण आहे? आपणच सांगा की, माझ्या आणि तुमच्या दरम्यान, अल्लाह साक्षी आहे[६]. आणि माझ्याजवळ हे कुरआन, 'वह्य' म्हणून पाठविण्यात आले आहे. कारण की, मी या कुरआनाच्या मार्फत, तुम्हास आणि ज्याला कोणाला हे कुरआन पोहोचेल, त्या सर्वांना भिववावे[७]; काय तुम्ही खरोखरच ही साक्ष द्याल की, अल्लाहतआलासोबत आणखी कोणी उपास्यपण आहे. आपण सांगून टाका की, मी तर साक्ष देत नाही. आपण सांगून टाका की, बस तो तर एकच उपास्य आहे. आणि नि:संशय मी तुमच्या शिर्क करण्यापासून तटस्थ आहे (१९)

اَلَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ يَعْرِفُوْنَهٗ كَمَا يَعْرِفُوْنَ اَبْنَآءَهُمْ ۘ اَلَّذِيْنَ خَسِرُوْۤا اَنْفُسَهُمْ فَهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿٢٠﴾

ज्या लोकांना आम्ही पुस्तक दिले आहे, ते लोक (आमच्या) पैगंबराला ओळखतात; ज्याप्रमाणे ते आपल्या मुलांना ओळखतात; परंतु ज्या लोकांनी आपणच आपले नुकसान करून घेतले आहे, ते तर ईमान आणणार नाहीत[८] (२०)

وَمَنْ اَظْلَمُ مِمَّنِ افْتَرٰى عَلَى اللّٰهِ كَذِبًا اَوْ كَذَّبَ بِاٰيٰتِهٖ ؕ اِنَّهٗ لَا يُفْلِحُ الظّٰلِمُوْنَ ﴿٢١﴾

आणि याच्यापेक्षा जास्त अन्यायी कोण असेल, जो अल्लाहतआलावर खोटे कुभांड रचील किंवा अल्लाहच्या निशाण्यांना खोटे ठरवील[९]? असे अत्याचारी लोक सफल होणार नाही[१०] (२१)

१) येथे वलीने अभिप्रेत उपास्य आहे; जसे की भाषांतराने स्पष्ट आहे; नाही तर मित्र बनविणे तर योग्य आहे.

२) म्हणजे मी सुद्धा माझ्या पालनकर्त्यांचा आज्ञाभंग करत असताना, अल्लाहला सोडून आणखी कोणाला उपास्य बनवून घेतले; तर मी सुद्धा अल्लाहच्या शिक्षेपासून वाचूशकणार नाही.

३) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''जो अग्नीपासून दूर आणि स्वर्गात दाखल करून दिला गेला, तो सफल होऊन गेला'' (सू. आले इम्रान - १८५) यासाठी की, साफल्य,घाट्यापासून वाचून जाणे व नफा प्राप्त करून घेण्याचे नांव आहे. आणि स्वर्गाहून मोठा नफा आणखी काय असेल?

४) म्हणजे नफा नुकसानीचा मालक, विश्वात सर्व प्रकारचा हस्तक्षेप करणारा फक्त अल्लाहच आहे. आणि त्याच्या हुकूमाला आणि आज्ञेला कोणी रद्द करणारा नाही. एका हदीसमध्ये या विषयाला अशाप्रकारे वर्णन करण्यात आले आहे, ''ज्याला तू देशील त्याला कोणी रोकणारा नाही. आणि तू रोकशील त्याला कोणी देणारा नाही. आणि कोण्या संपत्तीवाल्याला, त्याची संपत्ती तुझ्या मुकाबल्यांत नफा पोहचवू शकत नाही.'' (स.बुखारी, स.मुस्लीम) नबी ﷺ प्रत्येक नमाजीनंतर ही दुआ पढत असत.

५) म्हणजे सर्व माना त्याच्यासमोर झुकलेल्या आहेत. मोठ मोठे जालीम लोक, त्याच्यासमोर लाचार आहेत. तो प्रत्येक वस्तुंवर वरचढ आहे; आणि सारे विश्व त्याच्या आज्ञेत आहे. तो आपल्या प्रत्येक कामांत बुद्धीमान आहे आणि प्रत्येक वस्तूची खबर ठेवणारा आहे. बस त्याला ठाऊक आहे की, त्याचे उपकार आणि देणगीचा कोण हक्कदार आहे आणि कोण हक्कदार नाही.

६) म्हणजे अल्लाहतआलाच आपल्या एक होण्याचा आणि पालनकर्ता होण्याचा, सर्वांत मोठा साक्षीदार आहे. त्याच्याहून मोठा कोणी साक्षी नाही.

७) ह.रबीअ बिन अनस رضي الله عنه म्हणतात, आता ज्या कोणाजवळही हे कुरआन पोहचून जाईल, जर तो खरा रसूल ﷺ चा आज्ञाधारक आहे; तर त्याची जबाबदारी आहे की, त्यानेपण लोकांना अल्लाहकडे अशाप्रकारे बोलवावे, ज्या प्रमाणे रसूल ﷺ नी दावत दिली. आणि अशाचप्रकारे भिववावे, ज्याप्रमाणे आपण ﷺ नी लोकांना भिवविले, (इब्ने कसीर)

८) 'यअरेफूनहू' मध्ये अभिप्रेत रसूल ﷺ आहेत; म्हणजे ग्रंथधारी लोक आपणांस ﷺ आपल्या पुत्रांसारखे ओळखतात; कारण की आपली वैशिष्टये, त्यांच्या पुस्तकांत वर्णन करून देण्यात आली होती. आणि या वैशिष्टयांमुळे, ते शेवटच्या पैगंबराची वाटपण पाहात होते. म्हणून आता त्यांच्यातून ईमान न आणणारे मोठ्याच तोट्यांत आहेत; कारण की, ज्ञान असून सुद्धा नाकारत आहेत. ''जर तुला ज्ञान नाही, तर हे सुद्धा संकटच आहे, तथापि जर ज्ञान आहे, तर मग जास्त मोठे संकट आहे.''

९) म्हणजे ज्याप्रमाणे अल्लाहवर खोटे कुभांड रचणारा, (म्हणजे पैगंबरीचा खोटा दावेदार) सर्वात मोठा जालीम आहे. अशाचप्रकारे तो पण मोठा जालीम आहे, जो अल्लाहच्या महावाक्ये आणि त्याच्या खऱ्या रसूलला खोटे ठरवत. खोट्या पैगंबरीचा दावा करणाऱ्यावर इतकी कडक तंबी असून सुद्धा, या घटना घडल्या आहेत, की निरनिराळ्या लोकांनी प्रत्येक काळांत पैगंबरीचे खोटे दावे केले आहेत. आणि अशा प्रकारे खचित्च नबी ﷺ ची भविष्यवाणी पूर्ण होऊन गेली की, ३० खोटारडे दज्जाल होतील; प्रत्येकाचा दावा असेल की तो पैगंबर आहे. गेल्या शतकात पण, कादियानच्या एका माणसाने, पैगंबरीचा दावा केला. आणि आज त्याचे मानणारे, त्याला यासाठी खरा पैगंबर आणि काही लोक मसीहे मौऊद (ईसा عليه السلام) मानतात की त्याला एक छोटी संख्या पैगंबर मानते. वास्तविक काही लोकांचे कोण्या खोटारड्याला सच्चा मानणे, त्याच्या सत्यतेचा पुरावा बनू शकत नाही. सत्यतेसाठी तर कुरआन व हदीसच्या स्पष्ट पुराव्यांची आवश्यकता आहे. आणि या बाबतीत ते नेहमी अपयशी राहिले आहेत.

१०) जेव्हा हे दोन्हीही जालिम आहेत, तर खोटे बनविणारा यशस्वी होणार नाही. आणि खोटे ठरविणारा पण यशस्वी होणार नाही यासाठी आवश्यक आहे की, प्रत्येकाने आपल्या परिणामावर चिंतन करून घ्यावे.

وَيَوْمَ نَحْشُرُهُمْ جَمِيعًا ثُمَّ نَقُولُ لِلَّذِينَ أَشْرَكُوا أَيْنَ شُرَكَاؤُكُمُ الَّذِينَ كُنتُمْ تَزْعُمُونَ ﴿٢٢﴾

**आणि (तो वेळपण आठवण करण्यासारखाच आहे,) ज्या दिवशी आम्ही तमाम लोकांना जमा करू; मग आम्ही मुश्रिकांना विचारू की, तुमचे ते सरकतदार ज्याच्या उपास्य होण्याचा तुम्ही दावा करीत होता, कोठे गेले? ㉒**

ثُمَّ لَمْ تَكُن فِتْنَتُهُمْ إِلَّا أَن قَالُوا وَاللَّهِ رَبِّنَا مَا كُنَّا مُشْرِكِينَ ﴿٢٣﴾

**मग त्यांच्या शिर्कचा परिणाम याच्याशिवाय आणखी काही असणार नाही, की ते म्हणतील की, शपथ अल्लाहची आपल्या पालनकर्त्यांची ! आम्ही मुश्रिक नव्हतो[१] ㉓**

انظُرْ كَيْفَ كَذَبُوا عَلَىٰ أَنفُسِهِمْ ۚ وَضَلَّ عَنْهُم مَّا كَانُوا يَفْتَرُونَ ﴿٢٤﴾

**जरा पहा तर त्यांनी कशाप्रकारे खोटे बोलले, आपल्या जीवावर; आणि ज्या वस्तूंना ते खोटे खोटे घडवत असत, ते सर्व (त्यांच्यापासून) गायब होऊन गेलेत[२] ㉔**

وَمِنْهُم مَّن يَسْتَمِعُ إِلَيْكَ ۖ وَجَعَلْنَا عَلَىٰ قُلُوبِهِمْ أَكِنَّةً أَن يَفْقَهُوهُ وَفِي آذَانِهِمْ وَقْرًا ۚ وَإِن يَرَوْا كُلَّ آيَةٍ لَّا يُؤْمِنُوا بِهَا ۚ حَتَّىٰ إِذَا جَاءُوكَ يُجَادِلُونَكَ يَقُولُ الَّذِينَ كَفَرُوا إِنْ هَٰذَا إِلَّا أَسَاطِيرُ الْأَوَّلِينَ ﴿٢٥﴾

**आणि यांच्यातून काही असे आहेत, की आपल्याकडे कान लावतात[३], आणि आम्ही त्यांच्या मनावर पडदे टाकून ठेवले आहेत; यापासून की ते याला समजतील आणि त्यांच्या कानात डट्टे देऊन ठेवले आहेत[४]. आणि जर ते लोक सर्व पुराव्यांना पाहून घेतील, तरीपण त्यांच्यावर कधी ईमान आणणार नाही, येथ पावेतो की जेव्हा हे लोक आपल्याजवळ येतात, तर आपल्याशी निष्कारण झगडतात. हे लोक जे काफिर आहेत, ते म्हणतात की, हे तर काहीच नाही, फक्त बेसनद गोष्टी आहेत; ज्या पूर्वीच्या लोकांपासून, चालत आल्या आहेत[५] ㉕**

१) फित्न्याचा एक अर्थ वादविवाद , आणि एक अर्थ बहाणे बनविणे, असे केले गेले आहे. म्हणजे सरते शेवटी वादविवाद किंवा बहाणे करून सुटका करून घेण्याचा प्रयत्न करतील की, आम्ही तर मुशरिकच नव्हतो; आणि इमाम इब्ने जरीरने याचा अर्थ हा वर्णन केला आहे, ''जेव्हा आम्ही त्यांच्यावर प्रश्नांचा भडीमार करू, तर जगांत त्यांनी जे 'शिर्क' केले याच्या बहाणेबाजीसाठी, हे सांगण्यावाचून गत्यंतर राहणार नाही, की आम्ही तर मुश्रिकच नव्हतो.''येथे अशी शंका उपस्थित न व्हावी की, तेथे तर माणसांचे हातपाय साक्ष देतील, आणि तोंडावर तर मोहोर लावून दिली जाईल. मग हे इन्कार कसा काय करतील? याचे उत्तर ह.इब्ने अब्बास ﷺ नी असे दिले आहे की, जेव्हा मुश्रिकीन पहातील, की अहले तौहिद मुसलमान स्वर्गात जात आहेत; तर हे आपसांत सल्ला मसलत करून, आपल्या शिर्क करण्याचाच इन्कार करून देतील. तेव्हा अल्लाहतआला त्यांच्या तोंडावर मोहोर लावून देईल आणि त्यांचे हात पाय जे काही त्यांनी केले असेल, त्याची साक्ष देतील. आणि मग हे अल्लाहतआलापासून कोणी गोष्ट लपवूशकणार नाही. (इब्ने कसीर)

२) परंतु तेथे या निव्वळ खोट्याचा, काही फायदा त्यांना होणार नाही. ज्याप्रमाणे काही वेळा, जगांत मनुष्याला असे वाटते. अशाचप्रकारे त्यांचे निरर्थक उपास्यपण, ज्यांना ते अल्लाहचा सरकतदार आपला पक्षकार आणि मददगार, आणि शिफारस करणारा, समजत होते, अदृश्य होतील; आणि तेथे सरकतदारांची हकीकत स्पष्ट होऊन जाईल. परंतु तेथे याच्या निर्सनाचे काहीच स्वरूप राहणार नाही.

३) म्हणजे मुश्रिकीन, आपल्याजवळ येऊन कुरआनतर ऐकतात; परंतु वास्तविक पाहता, त्यांचा उद्देश मिळविण्याचा नसतो; म्हणून त्याचा काहीच फायदा नाही.

४) याशिवाय यांच्या कुफ्रच्या परिणामात, यांच्या मनावर पण आम्ही पडदे टाकून दिले आहेत. आणि त्यांच्या कानांत दट्टे. ज्या कारणांनी त्यांची मने, सत्य गोष्ट समजण्याला असमर्थ आणि त्यांचे कान सत्याला ऐकण्याला पण असमर्थ आहेत.

५) आता ते मार्गभ्रष्टतेच्या अशा दलदलमध्ये फसून गेले आहेत. की मोठ्यांत मोठा चमत्कार सुद्धा पाहून घेतील, तरी सुद्धा ईमान आणण्याच्या सुबुद्धीपासून वंचित राहतील. आणि त्यांचा अहंकार आणि द्वेष इतका वाढून गेला आहे की, ते कुरआन करीमला पहिल्या लोकांच्या बेसनद गोष्टी म्हणतात.

وَهُمْ يَنْهَوْنَ عَنْهُ وَيَنْـَٔوْنَ عَنْهُ ۖ وَإِن يُهْلِكُونَ
إِلَّآ أَنفُسَهُمْ وَمَا يَشْعُرُونَ ٢٦

आणि हे लोक यापासून दुसऱ्यांना पण मना करतात; आणि स्वत: सुद्धा त्यापासून दूरच दूर रहातात[१]. आणि हे लोक आपल्यालाच तबाह (व बर्बाद) करीत आहे. आणि त्यांना त्याची जाणीव नाही[२] (२६)

وَلَوْ تَرَىٰٓ إِذْ وُقِفُوا عَلَى النَّارِ فَقَالُوا يَٰلَيْتَنَا نُرَدُّ
وَلَا نُكَذِّبَ بِـَٔايَٰتِ رَبِّنَا وَنَكُونَ مِنَ الْمُؤْمِنِينَ ٢٧

आणि आपण जर त्यावेळी पहाल, जेव्हा की हे नरकाग्नीजवळ उभे केले जातील[३]; तेव्हा म्हणतील की, हाय! किती चांगली गोष्ट होईल की, आम्ही पुन्हा परत पाठवून दिले जाऊ. आणि जर असे होऊन जाईल, तर आम्ही पालनकर्त्यांच्या निशाण्यांना खोटे म्हणणार नाही; आणि आम्ही ईमानवाल्यांमधून होऊन जाऊ[४] (२७)

بَلْ بَدَا لَهُم مَّا كَانُوا يُخْفُونَ مِن قَبْلُ ۖ وَلَوْ
رُدُّوا لَعَادُوا لِمَا نُهُوا عَنْهُ وَإِنَّهُمْ لَكَٰذِبُونَ ٢٨

परंतु ज्या वस्तूला याच्यापूर्वी लपवित असत, ती त्यांच्यासमोर येऊन गेली आहे[५], आणि जर हे लोक पुन्हा परत पाठवून दिले जातील, तरी सुद्धा ते तीच कामे करतील, ज्यांपासून त्यांना मना करण्यांत आले होते; आणि खचित्‌च हे बिल्कुल लबाड आहेत[६] (२८)

وَقَالُوٓا إِنْ هِىَ إِلَّا حَيَاتُنَا الدُّنْيَا وَمَا نَحْنُ بِمَبْعُوثِينَ ٢٩

आणि हे म्हणतात की, फक्त हेच ऐहिक जीवन, आमचे जीवन आहे. आणि आम्ही जिवंत केले जाणार नाही[७] (२९)

وَلَوْ تَرَىٰٓ إِذْ وُقِفُوا عَلَىٰ رَبِّهِمْ ۚ قَالَ أَلَيْسَ هَٰذَا
بِالْحَقِّ ۚ قَالُوا بَلَىٰ وَرَبِّنَا ۚ قَالَ فَذُوقُوا الْعَذَابَ بِمَا
كُنتُمْ تَكْفُرُونَ ٣٠

आणि जर आपण त्या वेळी पाहाल, जेव्हा हे आपल्या पालनकर्त्यापुढे उभे केले जातील, अल्लाहतआला विचारील, काय ही घटना सत्य नाही? ते म्हणतील, नि:संशय शपथ आमच्या पालनकर्त्याची ! (की ही घटना सत्य आहे) अल्लाहतआला फर्मावील, तर मग आता आपल्या 'कुफ्र' च्या बदल्यात, शिक्षेची गोडी चाखा[८] (३०)

قَدْ خَسِرَ الَّذِينَ كَذَّبُوا بِلِقَآءِ اللَّهِ ۖ حَتَّىٰٓ إِذَا جَآءَتْهُمُ
السَّاعَةُ بَغْتَةً قَالُوا يَٰحَسْرَتَنَا عَلَىٰ مَا فَرَّطْنَا فِيهَا وَهُمْ
يَحْمِلُونَ أَوْزَارَهُمْ عَلَىٰ ظُهُورِهِمْ ۚ أَلَا سَآءَ مَا
يَزِرُونَ ٣١

नि:संशय घाट्यांत पडले ते लोक, ज्यांनी अल्लाहच्या भेटीला खोटे ठरविले. येथपावेतो की तो निश्चित वेळी, त्यांच्यावर अचानक येऊन पडेल; तेव्हा म्हणतील की अरेरे! खेद आहे, आमच्या हलगर्जीपणावर! जो याच्याबाबतीत (आमच्याकडून) झाला; आणि त्यांची स्थिती अशी होईल की, ते आपले ओझे आपल्या कमरेवर लादलेले असतील. चांगले ऐकून घ्या! की फार वाईट असेल ती गोष्ट जी यांच्यावर लादण्यात येईल[९] (३१)

وَمَا الْحَيَوٰةُ الدُّنْيَآ إِلَّا لَعِبٌ وَلَهْوٌ ۖ وَلَلدَّارُ الْءَاخِرَةُ
خَيْرٌ لِّلَّذِينَ يَتَّقُونَ ۗ أَفَلَا تَعْقِلُونَ ٣٢

आणि हे ऐहिक जीवन तर काहीच नाही शिवाय खेळ तमाशाच्या आणि परलोकाचे घर सदाचरणी लोकांसाठी फारच उत्तम आहे. काय तुम्ही जाणत बुझत नाही? (३२)

قَدْ نَعْلَمُ إِنَّهُ لَيَحْزُنُكَ الَّذِى يَقُولُونَ ۖ فَإِنَّهُمْ
لَا يُكَذِّبُونَكَ وَلَٰكِنَّ الظَّٰلِمِينَ بِـَٔايَٰتِ اللَّهِ يَجْحَدُونَ ٣٣

आम्हाला चांगले ठाऊक आहे की, आपणास यांच्या गोष्टी दु:खी करतात. हे लोक आपल्याला खोटे ठरवत नाही; किंबहुना हे जालीम तर अल्लाहच्या निशाण्यांना नाकारतात[१०] (३३)

१) म्हणजे सर्व सामान्य लोकांना आपण ﷺ पासून आणि कुरआनापासून रोकतात; की त्यांनी ईमान आणू नये; आणि स्वत:पण दूर राहतात.

२) परंतु लोकांना अडविणे, आणि स्वत:पण दूर राहणे; याच्याने आमचे आणि आमच्या पैगंबराचे काय वाईट होईल? अशाप्रकारे काम करून ते स्वत:पण नादानपणामुळे आपल्या सर्वनाशाचे आणि बर्बादीचे सामान तयार करीत आहे.

३) येथील ''लौ'' चे उत्तर 'महजुफ' आहे. अंदाजित विषय असा होईल, ''तर आपणांस महाभयंकर दृष्य दिसेल.''

४) परंतु तेथून दुसऱ्यांदा या जगांत येणे शक्यच होणार नाही; की ते आपल्या या आकांक्षेची पूर्तता करू शकतील. काफिरांच्या या आकांक्षेचा कुरआनाने अनेक ठिकाणी उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, ''हे आमच्या पालनकर्त्या!

आम्हास या नरकाग्नीतून काढून घे. जर आम्ही दुसऱ्यांदा तुझा आज्ञाभंग करू. तर खचितच् आम्ही जालीम असू. अल्लाहतआला फर्मावील, यांच्यात अप्रतिष्ठीत धुत्कारलेले बनून पडून रहा. तर माझ्याशी संभाषण करू नका.'' (सू. मोमिनून १०७,१०८) ''हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही पाहून घेतले आणि ऐकून घेतले; बस् आम्हाला दुसऱ्यांदा जगांत पाठवून दे. काकी आम्ही चांगली कामे करावी. आताआम्हाला खात्री होऊन चुकली आहे.'' (सू. अलीफ लाम मिम् सजदा – १२)

५) 'बल्'जे इजराब (म्हणजे पहिल्या गोष्टीकडून वेगळे होणे) यासाठी येते. याचे कित्येक प्रकार वर्णन करण्यांत आले आहेत.

(अ) यांच्यासाठी ते 'कुफ्र' आणि अहंकार व खोटे ठरवणे, जाहीर होऊन जाईल, जे यापूर्वी ते जगांत लपवीत होते. म्हणजे ज्याला नाकारत होते, जसे तेथेपण सुरवातीला म्हणतील, आम्ही तर मुशरिकच नव्हतो. (ब) किंवा रसूल व कुरआन करीमच्या सत्यतेचे ज्ञान, जे यांच्या मनांत होते, परंतु आपल्या अनुयायांकडून लपवीत होते. तेथे जाहीर होऊन जाईल. (क) दांभिकांचे ते दांभिकत्व तेथे जाहीर होऊन जाईल. ज्याला ते जगांत ईमानवाल्यांपासून लपवीत होते. (तफसीर इब्ने कसीर)

६) म्हणजे दुसऱ्यांदा जगांत येण्याची इच्छा ईमान आणण्यासाठी नाही; फक्त शिक्षेपासून वाचण्यासाठी आहे. जी यांच्यावर कयामतच्या दिवशी जाहीर होऊन जाईल; आणि ते प्रत्यक्ष पाहून घेतील. नाहीतर जर हे जगांत दुसऱ्यांदा पाठवून दिले जातील, तरी सुद्धा ते तेच करतील, जे पूर्वी करत राहिले आहे.

७) हे मेल्यानंतर दुसऱ्यांदा जिवंत होण्याला नाकारणे आहे. जे प्रत्येक काफिर करतो. आणि या सत्त्याला नाकारणे, वास्तविक त्यांच्या 'कुफ्र' आणि पाप करण्याची सर्वांत मोठी सबब आहे. नाही तर जर माणसांच्या मनांत खऱ्या अर्थाने ही परलोकाच्या श्रद्धेची सत्यता, मजबूत होऊन जाईल. तर कुफ्र आणि पापाच्या मार्गाकडून ताबडतोब पश्चात्ताप करणारा (ताईब) होऊन जाईल.

८) म्हणजे डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहून घेतल्यावर तर ते मान्य करून घेतील की, परलोकाचे जीवन खरोखरच सत्य आहे. परंतु तेथे या मान्यतेचा काही फायदा होणार नाही. आणि अल्लाहतआला त्यांना सांगेन की, आता तर आपल्या 'कुफ्र' च्या बदल्यात शिक्षेची गोडी चाखा.

९) अल्लाहच्या भेटीला नाकारणारे, ज्या तोट्यात आणि अपेक्षाभंगात व्यस्त होतील, आपल्या हलगर्जीपणावर ज्या प्रकारे पश्चात्ताप दग्ध होतील, आणि वाईट कर्मांचे ओझे आपल्यावर लादलेले असतील, या महावाक्यांत याचे चित्र रंगविण्यात आले आहे.

१०) नबी ﷺ ला काफिरांकडून आपल्याला खोटे पाडण्याबद्दल जे दु:ख पोहचवत असे, त्याच्या निरसनार्थ आणि आपल्या सांत्वनासाठी, सांगण्यात येत आहे की, हे खोटे ठरविणे आपले नाही. (आपल्याला तर ते सत्यप्रीय आणि विश्वसनीय मानतात.) वास्तविक हे अल्लाहच्या निशाण्यांना खोटे ठरविणे आहे. आणि हा एक जुलूम आहे; ज्याचा ते अंगिकार करीत आहेत. तिर्मिझी वगैरेच्या एका रिवायतीत आहे की, अबुजहलने एकदा रसूल ﷺ ला सांगितले, '' हे मुहम्मद! ﷺ आम्ही तर तुम्हास नाही, परंतु जे काही तुम्ही घेऊन आला आहांत, त्याला खोटे ठरवितो.'' यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. तिर्मिझीची ही रिवायत जरी, सनदेच्या दृष्टीने जअीफ आहे, परंतु दुसऱ्या सहीह रिवायतीने, या गोष्टीला मान्यता मिळते की, मक्केचे काफिर नबी ﷺ ची विश्वसनीयतेचे व ईमानदारीचे आणि सत्यप्रियतेचे मानणारे होते. परंतु असे असून सुद्धा ते आपल्या पैगंबरीवर ईमान आणण्यापासून दूरच राहिले. आजपण जे लोक, नबी ﷺ च्या सद्चारित्र्य, उत्तुंग कर्तृत्व आणि विश्वसनियता व सत्यप्रियता यांना फार चांगल्याप्रकारे वर्णन करतात, आणि या विषयावर चांगले बोलणे व बोलण्यांत अतिउच्च दर्जाला पोहचवणे याच्या सरिता वाहवून देतात; परंतु रसूल ﷺ च्या आज्ञापालनांत ते संकुचित वृत्ती दाखवतात; आपल्या ﷺ गोष्टीच्या मुकाबल्यात 'फिका व कयास' आणि इमामांचे कौल, यांना प्राधान्य देतात. त्यांना विचार करावयास पाहिजे कीं हे कोणाचे कर्तृत्व आहे, ज्याला त्यांनी अंगिकारले आहे?

وَلَقَدْ كُذِّبَتْ رُسُلٌ مِّن قَبْلِكَ فَصَبَرُوا عَلَىٰ مَا كُذِّبُوا وَأُوذُوا حَتَّىٰ أَتَاهُمْ نَصْرُنَا ۚ وَلَا مُبَدِّلَ لِكَلِمَاتِ اللَّهِ ۚ وَلَقَدْ جَاءَكَ مِن نَّبَإِ الْمُرْسَلِينَ ﴿٣٤﴾

**आणि पुष्कळसे पैगंबर जे आपल्यापूर्वी झाले आहेत, त्यांनापण खोटे ठरविले जाऊन चुकले आहे. तर त्यांनी यावर सहनशिलताच पत्करली; की त्यांना खोटे ठरविण्यात आले; आणि त्यांना इजा देण्यात आल्या; येथपावेतो की माझी मदत त्यांना पोहोचली(१) आणि अल्लाहच्या गोष्टींना कोणी बदलवणारा नाही(२) आणि आपणाजवळ काही पैगंबराच्या काही गोष्टी पोहचून चुकल्या आहेत(३) ३४**

وَإِن كَانَ كَبُرَ عَلَيْكَ إِعْرَاضُهُمْ فَإِنِ اسْتَطَعْتَ أَن تَبْتَغِيَ نَفَقًا فِي الْأَرْضِ أَوْ سُلَّمًا فِي السَّمَاءِ فَتَأْتِيَهُم بِآيَةٍ ۚ وَلَوْ شَاءَ اللَّهُ لَجَمَعَهُمْ عَلَى الْهُدَىٰ ۚ فَلَا تَكُونَنَّ مِنَ الْجَاهِلِينَ ﴿٣٥﴾

النصف

**आणि जर आपणास यांचा आक्षेप फारच वाईट वाटतो; तर जर आपणास हे सामर्थ्य असेल की, जमिनीत एखादे भुयार किंवा आकाशात एखादी शिडी शोधून घ्या. मग कोणी चमत्कार घेऊन याल तर (तसे) करा. आणि जर अल्लाहला मंजूर असते, तर या सर्वांना सरळ मार्गावर एकत्रित करून टाकले असते(४). तरी आपण नादानातून होऊन जाऊ नये(५) ३५**

إِنَّمَا يَسْتَجِيبُ الَّذِينَ يَسْمَعُونَ ۘ وَالْمَوْتَىٰ يَبْعَثُهُمُ اللَّهُ ثُمَّ إِلَيْهِ يُرْجَعُونَ ﴿٣٦﴾

**तेच लोक मान्य करतात, जे ऐकतात(६), आणि मृतांना अल्लाह जिवंत करून उठवील; मग सर्व अल्लाहकडेच आणले जातील ३६**

१) नबी ﷺ च्या आणखी सांत्वनासाठी सांगण्यात येत आहे की, हा काही पहिलाच प्रसंग नाही की काफिर अल्लाहच्या पैगंबराला नाकारत आहे; किंबहुना याच्यापूर्वी सुद्धा अनेक पैगंबर येऊन चुकले आहेत, ज्यांना खोटे ठरविले गेले आहे. बस आपण पण त्यांचे अनुकरण करत याप्रमाणे सहनशिलतेने आणि धैर्याने काम करावे; ज्याप्रमाणे त्यांनी खोटे ठरविल्यानंतर आणि इजा पोहचवण्यावर धैर्याने आणि सहनशिलतेने काम केले, येथपावेतो की, आपल्याजवळ त्याचप्रमाणे मदत येऊन पोहोचेल ज्याप्रमाणे पहिल्या पैगंबराची आम्ही मदत केली. आणि आम्ही आपल्या वायद्याच्या विरूद्ध करीत नसतो. आम्ही वायदा केला आहे, ''खचितच आम्ही आपल्या पैगंबराची आणि ईमानवाल्यांची मदत करू.'' (सू. अल्मोमिन - ५१) ''अल्लाहने हा निर्णय करून टाकला आहे की, मी आणि माझे पैगंबर वरचढ राहतील.'' (सू. मुजादिला - २१) आणि इतर महावाक्ये उदाहरणार्थ (सू. साफ्फात १७१-१७२)

२) किंबहुना त्याचा वायदा पूर्ण होऊन राहिल की, आपण काफिरांवर प्रबळ आणि विजयी व्हाल. आणि झालेही असेच.

३) ज्याने स्पष्ट झाले की, सुरवातीला जरी त्यांच्या समाजाने त्यांना खोटे ठरविले, त्यांना इजा पोहचविली; आणि त्यांच्यासाठी जीवन जगणे कठीण करून टाकले; परंतु सरतेशेवटी अल्लाहच्या मदतीने साफल्य आणि यश, आणि कायमची मुक्ती त्यांच्याच नशिबी आली.

४) नबी ﷺ ला काफिरांच्या खोटे ठरविल्याने जे दु:ख आणि त्रास होत होता; याच हवाल्याने अल्लाहतआला सांगत आहे की, ही अल्लाहतआलाची मर्जी, आणि दैवाने होणारच होते; आणि अल्लाहच्या हुकूमाशिवाय आपण त्यांना इस्लाम कबूल करावयास तयार करू शकत नाही. येथपावेतो की, आपण कोणी भुयार खोदून किंवा आकाशावर शिडी लावून, सुद्धा कोणी निशाणी आणून त्यांना दाखवून द्याल; तर प्रथम तर असे करणे आपणास अशक्य आहे. आणि जर समजा आपण असे करून दाखवाल, तरी सुद्धा हे ईमान आणणार नाही. कारण की त्यांचे ईमान न आणणे, अल्लाहच्या युक्ती आणि मर्जीवर अवलंबून आहे. ज्याचे संपूर्ण आकलन, मानवी बुद्धी आणि समज करू शकत नाही. तथापि, त्याची एक उघड प्रयुक्ती ही आहे की, अल्लाह त्यांना अधिकार आणि विचार स्वातंत्र्य देऊन, त्यांची परीक्षा घेत आहे. नाहीतर अल्लाहतआलासाठी, तमाम मानवांना हिदायतच्या एका मार्गावर लावून देणे, कठीण काम नव्हते. याच्या करीता शब्द 'कुन' (होऊन जा) ने, पापणी लावण्याअगोदर हे काम होऊ शकते.

५) म्हणजे आपण यांच्या कुफ्रवर जास्त खेद आणि दु:ख करू नका; कारण याचा संबंध अल्लाहतआलाच्या मर्जीवर आणि दैवाशी आहे. म्हणून आपण या गोष्टीला अल्लाहच्याच हवाली करून द्या. तोच याच्या युक्तीला आणि प्रयोजनाला फार चांगल्या प्रकारे समझतो.

६) आणि या काफिरांची अवस्था तर अशी आहे; जशी मृतांची असते. ज्या प्रमाणे ते ऐकू आणि समजू शकत नाही, हे पण आपल्या अक्कल हुशारीने सत्त्याला जाणून घेण्याचे काम घेत नाही. म्हणून हे पण मृतच आहेत.

وَقَالُوا لَوْلَا نُزِّلَ عَلَيْهِ آيَةٌ مِّن رَّبِّهِ ۚ قُلْ إِنَّ اللَّهَ قَادِرٌ عَلَىٰ أَن يُنَزِّلَ آيَةً وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٣٧﴾

**आणि हे लोक म्हणतात की, त्यांच्यावर एखादा चमत्कार का नाही अवतरीत केला गेला, त्यांच्या पालनकर्त्याकडून आपण सांगून टाका की, अल्लाहतआलाला नि:संशय पूर्ण सामर्थ्य आहे, यावर की तो चमत्कार सादर करील[१]. परंतु त्यांच्यातून बहुतेक लोक जाणत नाही[२]** (३७)

وَمَا مِن دَابَّةٍ فِي الْأَرْضِ وَلَا طَائِرٍ يَطِيرُ بِجَنَاحَيْهِ إِلَّا أُمَمٌ أَمْثَالُكُم ۚ مَّا فَرَّطْنَا فِي الْكِتَابِ مِن شَيْءٍ ۚ ثُمَّ إِلَىٰ رَبِّهِمْ يُحْشَرُونَ ﴿٣٨﴾

**आणि जितक्या प्रकारचे जीवधारी जमिनीवर चालणारे आहेत आणि जितक्या प्रकारचे पक्षी आहेत की, आपल्या दोन्ही पंखांनी उडतात; यांच्यातून कोणी असा प्रकार नाही; जे तुमच्याप्रमाणे समूह नसतील[३], आम्ही दप्तरात कुठलीही वस्तू सोडली नाही[४]. मग सर्व आपल्या पालनकर्त्याकडे जमा केले जातील[५]** (३८)

وَالَّذِينَ كَذَّبُوا بِآيَاتِنَا صُمٌّ وَبُكْمٌ فِي الظُّلُمَاتِ ۗ مَن يَشَإِ اللَّهُ يُضْلِلْهُ وَمَن يَشَأْ يَجْعَلْهُ عَلَىٰ صِرَاطٍ مُّسْتَقِيمٍ ﴿٣٩﴾

**आणि जे लोक आमच्या महावाक्यांना खोटे ठरवितात, ते तर नाना प्रकारच्या अंध:कारांत बहिरे आणि मुके होत आहेत. अल्लाह ज्याला इच्छील त्याला मार्गभ्रष्ट करून टाकील;आणि ज्याला इच्छेल त्याला सरळ मार्गाला लावून देईन[६]** (३९)

१) म्हणजे असा चमत्कार जो यांना ईमान आणण्याला भाग पाडेल. जसे यांच्या डोळ्यादेखत देवदूताने उतरावे, किंवा पर्वत त्यांच्यावर उचलून लोंबकळत ठेवला जावा, ज्याप्रमाणे बनी इसराईलवर लोंबकळत ठेवला होता. आपण ﷺ नी सांगितले की, अल्लाहतआला तर खचितच असे करू शकतो; परंतु त्याने यासाठी असे केले नाही की, मग मानवाच्या परीक्षा घेण्याची समस्याच संपून गेली असती; याशिवाय त्यांच्या मागणीनुसार, जर काही चमत्कार दाखविला गेला असता. मग तरी सुद्धा जर त्यांनी ईमान आणले नसते; तर मग लगेच त्यांना या जगातच कडक शिक्षा दिली गेली असती. अशा प्रकारे जणू अल्लाहच्या प्रयुक्तीमध्ये सुद्धा त्यांचा ऐहिक फायदा आहे.

२) जे अल्लाहचा हुकूम आणि मर्जीच्या पूर्ण बुद्धि सामर्थ्याला समजू शकत नाही.

३) म्हणजे त्यांना पण अल्लाहतआलाने अशा प्रकारे निर्माण केले, जसे तुम्हांस निर्माण केले. अशाच प्रमाणे त्यांना उपजीविका देतो, ज्याप्रमाणे तुम्हास देत आहे. आणि तुमच्याच प्रमाणे ते सुद्धा त्याच्या सामर्थ्य आणि ज्ञानाअंतर्गत दाखल आहेत.

४) पुस्तक (दप्तराने) अभिप्रेत 'लोहे महेफुज' आहे. म्हणजे तेथे प्रत्येक गोष्ट समाविष्ट आहे; किंवा अभिप्रेत कुरआन आहे; ज्यात ढोबळरीत्या किंवा तपशिलाने धर्माच्या प्रत्येक गोष्टीवर प्रकाश टाकला गेला आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले ''आम्ही आपणांवर असे पुस्तक उतारले आहे, ज्यांत प्रत्येक गोष्टीचे वर्णन आहे.'' (सू. अन्नहल - ८९) येथे हिशेबाच्या दृष्टीने, पहिला अर्थ जवळचा आहे.

५) म्हणजे सर्व उल्लेखित समूह एकत्र केले जातील; याच्याने धर्मपंडितांच्या एका गटाने आधार घेतला आहे की, ज्याप्रमाणे सर्व माणसांना जिवंत करून त्यांचा हिशेब घेतला जाईल, जनावरे आणि दुसऱ्या सर्व जीवसृष्टीला पण जिवंत करून, त्यांचापण लेखाजोखा होईल. ज्याप्रमाणे एका हदीसमध्ये सुद्धा, नबी ﷺ नी सांगितले, ''एखाद्या शिंगवाल्या बकरीने, जर कोण्या शिंग नसलेल्या बकरीवर अत्याचार केला असेल, तर कयामतच्या दिवशी, शिंगवाल्या बकरीकडून बदला घेतला जाईल.'' (स.मुस्लीम) काही धर्मपंडितांनी 'हशर्' ने अभिप्रेत फक्त मृत्यू घेतला आहे; म्हणजे सर्वांना मृत्यू येईल. आणि काही धर्मपंडितांनी सांगितले आहे की, येथे 'हशर्' ने अभिप्रेत काफिरांचा 'हशर्' आहे. आणि उल्लेखित हदीस (ज्यात बकरी कडून बदला घेण्याचा उल्लेख आहे.) नमुना म्हणून आहे; ज्याच्याने उद्देश्य कयामतच्या दिवशी हिशेबाचे महत्त्व आणि महत्ततेला स्पष्ट करणे आहे. किंवा असे की, जनावरातून फक्त अत्याचारी आणि अत्याचार पीडितांना जिवंत करून, अत्याचाऱ्यांकडून अत्याचार पीडितांना बदला दिला जाईल. मग दोन्ही नष्ट करून टाकले जातील. (फत्हुल कदीर वगैरे) यांचे समर्थन काही हदिसींनीपण होते.

६) अल्लाहच्या महावाक्यांना, खोटे ठरविणारे कारण की, आपल्या कानांनी सत्य गोष्ट ऐकत नाही; आणि आपल्या तोंडाने सत्य गोष्ट बोलत नाही; म्हणून ते असेच आहेत जसे बहिरे आणि मुके असतात. याशिवाय ते कुफ्र आणि मार्गभ्रष्टतेच्या अंधकारात पण घेरलेले आहेत; म्हणून त्यांना कोणी अशी वस्तू दिसत नाही, जिच्याने त्यांची सुधारणा होऊं शकेल. बस त्यांची आकलन शक्ती नष्ट होऊन गेली, ज्यामुळे ते कुठल्याही परिस्थितीत फायदा घेऊ शकत नाही. मग सांगितले, सर्व अधिकार अल्लाहच्या हातात आहेत. तो ज्याला इच्छेल, त्याला मार्गभ्रष्ट करून टाकेल, आणि ज्याला इच्छील त्याला सरळ मार्गाला लावून देईल. परंतु त्याचा हा निर्णय निराधार नसतो; किंबहुना न्यायाच्या मागणीनुसार असतो. मार्गभ्रष्ट त्यालाच करतो, जो स्वत: मार्गभ्रष्टतेत फसलेला असतो. आणि त्याच्यातून निघण्याचा प्रयत्न करीत नाही; तसेच त्याच्या निघण्यालाही तो पसंत करीत नाही. (आणखी पहावे सू.बकर:च्या आ.क्र.२६ चा समास)

قُلْ أَرَءَيْتَكُمْ إِنْ أَتَىٰكُمْ عَذَابُ ٱللَّهِ أَوْ أَتَتْكُمُ ٱلسَّاعَةُ أَغَيْرَ ٱللَّهِ تَدْعُونَ إِن كُنتُمْ صَٰدِقِينَ ﴿٤٠﴾

आपण (त्यांना) सांगा की, आपली स्थिती तर दाखवा की, जर तुमच्यावर अल्लाहचा काही प्रकोप येऊन पडेल, किंवा तुमच्यावर कयामतच येऊन पोहोचेल, तर काय अल्लाहच्या शिवाय आणखी कोणाला (मदतीसाठी) पुकारणार? जर तुम्ही खरे आहात ४०

بَلْ إِيَّاهُ تَدْعُونَ فَيَكْشِفُ مَا تَدْعُونَ إِلَيْهِ إِن شَآءَ وَتَنسَوْنَ مَا تُشْرِكُونَ ﴿٤١﴾

किंबहुना खास त्यालाच बोलाविणार. मग ज्यासाठी त्याला बोलाविणार, जर तो इच्छेल तर त्याला तुमच्यावरून हटवून पण टाकील; आणि ज्यांना तुम्ही सरकतदार ठरवीत आहात, त्या सर्वांना विसरून जाल[१] ४१

وَلَقَدْ أَرْسَلْنَآ إِلَىٰٓ أُمَمٍ مِّن قَبْلِكَ فَأَخَذْنَٰهُم بِٱلْبَأْسَآءِ وَٱلضَّرَّآءِ لَعَلَّهُمْ يَتَضَرَّعُونَ ﴿٤٢﴾

आणि आम्ही, आणखी उम्मतींकडे सुद्धा, ज्या आपल्यापूर्वी होऊन गेल्या आहेत; पैगंबर पाठविले होते; मग आम्ही त्यांना तंगदस्ती आणि आजाराने घेरले की, त्यांनी नम्रपणे आमच्यासमोर झुकावे ४२

فَلَوْلَآ إِذْ جَآءَهُم بَأْسُنَا تَضَرَّعُوا۟ وَلَٰكِن قَسَتْ قُلُوبُهُمْ وَزَيَّنَ لَهُمُ ٱلشَّيْطَٰنُ مَا كَانُوا۟ يَعْمَلُونَ ﴿٤٣﴾

मग जेव्हा त्यांना आमची शिक्षा पोहोचली होती, तेव्हा त्यांनी नम्रता दर्शविली नाही? परंतु त्यांची अंत:करणे कठीण होऊन गेलीत; आणि शैतानाने त्यांच्या कर्मांना ,त्यांच्या विचारांत सुशोभित करून दिले[२] ४३

فَلَمَّا نَسُوا۟ مَا ذُكِّرُوا۟ بِهِۦ فَتَحْنَا عَلَيْهِمْ أَبْوَٰبَ كُلِّ شَىْءٍ حَتَّىٰٓ إِذَا فَرِحُوا۟ بِمَآ أُوتُوٓا۟ أَخَذْنَٰهُم بَغْتَةً فَإِذَا هُم مُّبْلِسُونَ ﴿٤٤﴾

मग जेव्हा ते लोक, या गोष्टींना विसरून गेले, ज्यांचा त्यांना उपदेश केला जात होता; तेव्हा आम्ही त्यांच्यावर प्रत्येक वस्तूचे दरवाजे मोकळे करून टाकले, येथपावेतो की, जेव्हा या वस्तुंवर ज्या त्यांना मिळत होत्या, ते फार ऐटीत येऊन गेले; आम्ही त्यांना अचानक पकडून घेतले; मग तर ते फारच निराश होऊन गेले ४४

فَقُطِعَ دَابِرُ ٱلْقَوْمِ ٱلَّذِينَ ظَلَمُوا۟ ۚ وَٱلْحَمْدُ لِلَّهِ رَبِّ ٱلْعَٰلَمِينَ ﴿٤٥﴾

मग जालिम लोकांचा वंशच्छेद झाला. आणि अल्लाहतआलाचे आभार आहे, जो सकल जगांचा पालनकर्ता आहे[३] ४५

قُلْ أَرَءَيْتُمْ إِنْ أَخَذَ ٱللَّهُ سَمْعَكُمْ وَأَبْصَٰرَكُمْ وَخَتَمَ عَلَىٰ قُلُوبِكُم مَّنْ إِلَٰهٌ غَيْرُ ٱللَّهِ يَأْتِيكُم بِهِ ۗ ٱنظُرْ كَيْفَ نُصَرِّفُ ٱلْءَايَٰتِ ثُمَّ هُمْ يَصْدِفُونَ ﴿٤٦﴾

आपण सांगा की, हे दाखवा जर, अल्लाहतआला तुमची श्रवणशक्ती व दृष्टी बिल्कुल हिरावून घेईल; आणि तुमच्या अंत:करणारवर मोहोर लावून टाकेल; तर अल्लाहतआला शिवाय आणखी कोणी उपास्य आहे की, हे तुम्हांस परत देईल;आपण पहातर खरे की, आम्ही कशाप्रकारे पुराव्यांना वेगवेगळ्या दृष्टीकोनातून सादर करीत आहोत; तरी सुद्धा हे आक्षेप घेतात[४] ४६

قُلْ أَرَءَيْتَكُمْ إِنْ أَتَىٰكُمْ عَذَابُ ٱللَّهِ بَغْتَةً أَوْ جَهْرَةً هَلْ يُهْلَكُ إِلَّا ٱلْقَوْمُ ٱلظَّٰلِمُونَ ﴿٤٧﴾

आपण (सल्ल) त्यांना विचारा की, हे तर दाखवा की, जर तुमच्यावर अल्लाहचा प्रकोप येऊन कोसळेल, जरी अचानक किंवा माहित असतांना, तर काय जालीम लोकांशिवाय आणखी कोणी नष्ट केला जाईल?[५] ४७

وَمَا نُرْسِلُ ٱلْمُرْسَلِينَ إِلَّا مُبَشِّرِينَ وَمُنذِرِينَ ۖ فَمَنْ ءَامَنَ وَأَصْلَحَ فَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُونَ ﴿٤٨﴾

आणि आम्ही पैगंबरांना फक्त यासाठी पाठवितो की, त्यांनी खुषखबरी द्यावी आणि भिववावे[६]. मग जो ईमान घेऊन येईल आणि (आपल्यांत) सुधारणा करून घेईल, तर अशा लोकांना कुठलेही भय नाही, आणि ते दु:खी पण होणार नाही[७] ४८

१) 'अरअयुतुकुम' मध्ये काफ आणि मीम संबोधित करण्यासाठी आहेत. याचा अर्थ 'अखबिरूनी' (मला दाखला किंवा खबर द्या) चा आहे. या विषयाला पण कुरआन करीममध्ये कित्येक ठिकाणी वर्णन करण्यांत आले आहे. (पहा.सू.बकर :आ.क्र/१६५ चा समास) याचा अर्थ हा झाला की, तौहीद (एकेश्वरवाद) माणसाचा प्रकृतीचा नैसर्गिक आवाज आहे. मनुष्य वातावरण किंवा वाडवडिलांच्या अंधानुकरणाने शिर्कवाल्या श्रद्धा आणि कर्मांमध्ये लिप्त रहातो; आणि अल्लाहशिवाय इतरांना आपले इच्छापूर्ती करणारे व संकट निवारक समजतो. नवसपण त्यांच्याच नांवाने मानतो. परंतु जेव्हा कधी कोण्या संकटात सापडतो; तर मग हे सर्व विसरून जातो; आणि त्यांची नैसर्गिक श्रद्धा या सर्वांवर प्रबळ होऊन जाते. मग मनुष्य आपोआप त्या व्यक्तीला पुकारतो, ज्याला पुकारले पाहिजे. अरेरे! लोक याच

नैसर्गिक श्रद्धेवर कायम राहते! की, परलोकांतील मुक्ती तर संपूर्णपणे फितरत (नैसर्गिक) चा आवाज, म्हणजे एकेश्वरवादा (तौहीद) च्या अंगिकारण्यातच आहे.

२) समाज, जेव्हा चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या अध:पतनात व्यस्त होऊन आपल्या अंत:करणांना जंगयुक्त करून घेतात, त्यावेळी अल्लाहच्या शिक्षापण, त्यांना गफलतीतून जागे करणे यात पण अयशस्वी राहतात. मग त्यांचे हात क्षमायाचनेसाठी अल्लाहसमोर उठत नाहीत. त्यांची अंत:करणे त्याच्या दरवाज्यासमोर झुकत नाही. आणि त्यांचे चेहरे सुधारणेकडे वळत नाही. परंतु आपल्या दुष्कृत्यांवर बचावांच्या दलीली आणि कारण मिमांसाचे सुंदर प्रावरण चढवून आपल्या मनाचे समाधान करून घेतात. या महावाक्यात अशाच समाजाचे ते कर्तृत्व वर्णन करण्यात आले आहे, ज्याला शैतानाने त्यांच्यासाठी सुशोभित करून दिलेले असते.

३) यात अल्लाहला विसरून गेलेल्या समाजांच्या बाबतीत अल्लाहतआला वर्णन करीत आहे की, आम्ही काही वेळा, तात्पुरत्या स्वरूपात अशा समाजावर ऐहिक सुखसोयी आणि समृद्धतेचे दरवाजे उघडून देतो; येथपावेतो की, जेव्हा ते यांत फारच मग्न होऊन जातात; आणि आपल्या भौतिक सुबत्ता आणि प्रगतीवर ऐट दाखवू लागतात; तेव्हा मग आम्ही त्यांना अचानक जवाब देण्याच्या पकडीत घेऊन घेतो आणि त्यांचा वंशच्छेद करून टाकतो. हदीसमध्ये येते, नबी ﷺ नी फर्माविले की जेव्हा तुम्ही पाहाल की, अल्लाहतआलाच्या आज्ञाभंजनावर सुद्धा कोणाला त्याच्या इच्छेप्रमाणे अल्लाह दुनिया देत आहे; तर हे ढील देणे आहे. मग आपण ﷺ नी हीच आयत तिलावत केली. (मुसनद अहमद) कुरआन करीमच्या या महावाक्याने आणि नबी ﷺ च्या हदीशीने ठाऊक झाले की, ऐहिक प्रगती आणि सुबत्ता या गोष्टींचा पुरावा नाही की, ज्या व्यक्तीला किंवा समाजाला ही प्राप्त होईल. ती अल्लाहची लाडकी (आवडती) आहे; आणि अल्लाहतआला तिच्यावर खूष आहे. जसे की काही लोक असे समजतात. किंबहुना काही तर त्यांना ''अन्नल अर्ज यरीसुहा इबादियस्सालेहून'' (सू. अंबीया - १०५) चा पुरावा ठरवून, त्यांना 'अल्लाहचे पुण्यवान सेवक' पण ठरवतात. असे समजणे आणि म्हणणे चूक आहे; मार्गभ्रष्ट समाज किंवा व्यक्तींची ऐहिक सुबत्ता कसोटी आणि ढील देण्याकरीता आहे. असे नाही की ही त्यांच्या कुफ्र आणि पापांची देणगी आहे.

४) डोळे, कान आणि हृदय हे माणसाचे फारच महत्त्वाचे अवयव आहेत. अल्लाहतआला फर्मावीत आहे की, जर तो इच्छील तर त्यांची ती वैशिष्टये, जी अल्लाहतआलाने त्यांच्यात ठेवली आहे, नष्ट करून टाकेन, म्हणजे ऐकणे,पहाणे आणि समजवण्याची वैशिष्टये,ज्याप्रमाणे काफिरांचे हे अवयव, या वैशिष्टयांनी वंचित असतात; किंवा जर तो इच्छील तर या अवयवांना तसेच पण संपून टाकेन. तो दोन्ही गोष्टी करण्यांस समर्थ आहे. त्याच्या पकडीपासून कोणी वाचू शकत नाही. परंतु हे की, तो स्वत:च कोणाला वाचवू इच्छेल. महावाक्यांना वेगवेगळ्या दृष्टीकोनातून सादर करण्याचा उद्देश हा आहे की, कधी धमकावून, कधी भिववून, कधी लोभ दाखवून, किंवा अन्य मार्गाने समजाऊन सांगणे.

५) 'बगततन्' (असावधपणा) ने अभिप्रेत रात्र आणि 'जहरतन्' (सावधानता) ने अभिप्रेत दिवस आहे. ज्याला सू. यूनुसमध्ये, 'बयातन् अव नहारन्' (सू. यूनुस - ५०) ने संबोधित करण्यात आले आहे. म्हणजे दिवसा प्रकोप येऊन पोहोचेल किंवा रात्री, किंवा मग 'बगततन्' तो प्रकोप आहे, जो अचानक कुठल्याही प्रस्तावना आणि कुठल्याही पूर्व सूचनेशिवाय येऊन पोहचावा आणि 'जहरतन्' तो प्रकोप जो प्रस्तावना आणि पूर्व जाणीव दिल्यानंतर यावा. या शिक्षा ज्या समाजांना नष्ट करण्यासाठी येतात; त्यांच्यावरच येतात, जे जालीम असतात.म्हणजे कुफ्र आणि मोठा जुलूम आणि अल्लाहच्या आज्ञाभंगामध्ये मर्यादेचे उल्लंघन करतात, त्यांच्यावरच येतात.

६) ते आज्ञापालन करणाऱ्याना, त्या देणग्या आणि मोठ्या पुण्यफलाची खुषखबर देतात ज्या, अल्लाहतआलाने स्वर्गाच्या स्वरूपात त्यांच्यासाठी तयार करून ठेवल्या आहेत. आणि आज्ञाभंजकांना त्या शिक्षेपासून भिवविता, ज्या अल्लाहतआलाने त्यांच्यासाठी नरकाग्नीच्या स्वरूपांत तयार करून ठेविले आहे.

७) भविष्यात (म्हणजे परलोकात) येणाऱ्या परिस्थितींचे त्यांना भय नाही; आणि आपल्यामागे, जगात जे काही सोडून आले किंवा जगांतली सुबत्ता ते प्राप्त करू शकले नाही; यावर ते दु:खी होणार नाहीत. कारण की, दोन्ही जगात (इहलोक आणि परलोक) त्यांचा मित्र आणि कार्यसाधक तो पालनकर्ता आहे. जो दोन्ही जगाचा पालनकर्ता आहे.

وَالَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا يَمَسُّهُمُ الْعَذَابُ بِمَا كَانُوْا يَفْسُقُوْنَ ۝٤٩

आणि जे लोक आमच्या महावाक्यांना खोटे ठरवतात त्यांना शिक्षा पोहचेल, यासाठी की ते मर्यादेच्या बाहेर निघून जातात[१] (४९)

قُلْ لَّآ اَقُوْلُ لَكُمْ عِنْدِيْ خَزَآىِٕنُ اللّٰهِ وَلَآ اَعْلَمُ الْغَيْبَ وَلَآ اَقُوْلُ لَكُمْ اِنِّيْ مَلَكٌ ۚ اِنْ اَتَّبِعُ اِلَّا مَا يُوْحٰٓى اِلَيَّ ۗ قُلْ هَلْ يَسْتَوِي الْاَعْمٰى وَالْبَصِيْرُ ۗ اَفَلَا تَتَفَكَّرُوْنَ ۝٥٠ ع ٥/٩/١١

आपण (सल्ल) सांगून टाका की, मी तुम्हास सांगत नाही की, माझ्याजवळ अल्लाहचे खजीने आहेत. आणि मी अदृष्ट (गोष्टी) जाणत नाही. आणि मी तुम्हास हे सांगत नाही की, मी देवदूत आहे. मी तर फक्त जे काही मजजवळ 'वह्य' येते, त्याचे अनुपालन करतो[२]. आपण (सल्ल) सांगून टाका की, आंधळा आणि डोळस काय बरोबर होऊ शकतात?[३] तर मग काय तुम्ही चिंतन करीत नाहीत? (५०) ५/९/११

وَاَنْذِرْ بِهِ الَّذِيْنَ يَخَافُوْنَ اَنْ يُّحْشَرُوْٓا اِلٰى رَبِّهِمْ لَيْسَ لَهُمْ مِّنْ دُوْنِهٖ وَلِيٌّ وَّلَا شَفِيْعٌ لَّعَلَّهُمْ يَتَّقُوْنَ ۝٥١

आणि अशा लोकांना भिववा, ज्यांना या गोष्टीची भीती वाटते, की आपल्या पालनकर्त्याजवळ अशा स्थितीत गोळा केले जातील, की त्याच्याशिवाय त्यांचा कोणी मददगार होणार नाही. आणि कोणी शिफारसी (पण) होणार नाही, या आशेवर की त्यांनी भिऊन जावे[४] (५१)

وَلَا تَطْرُدِ الَّذِيْنَ يَدْعُوْنَ رَبَّهُمْ بِالْغَدٰوةِ وَالْعَشِيِّ يُرِيْدُوْنَ وَجْهَهٗ ۗ مَا عَلَيْكَ مِنْ حِسَابِهِمْ مِّنْ شَيْءٍ وَّمَا مِنْ حِسَابِكَ عَلَيْهِمْ مِّنْ شَيْءٍ فَتَطْرُدَهُمْ فَتَكُوْنَ مِنَ الظّٰلِمِيْنَ ۝٥٢

आणि त्या लोकांना (आपल्यापासून) काढू नका, जे सकाळ संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याची उपासना करतात, खास त्याच्याच प्रसन्नतेचे इच्छुक असतात.त्यांच्या हिशेबाची जरा पण जबाबदारी आपल्या जिम्मे नाही. आणि आपल्या हिशेबाची जबाबदारी त्यांच्या जिम्मे नाही; की आपण त्यांना काढून लावावे नाहीतर आपण जुलूम करणाऱ्यामधून होऊन जाल[५] (५२)

وَكَذٰلِكَ فَتَنَّا بَعْضَهُمْ بِبَعْضٍ لِّيَقُوْلُوْٓا اَهٰٓؤُلَآءِ مَنَّ اللّٰهُ عَلَيْهِمْ مِّنْ ۢ بَيْنِنَا ۗ اَلَيْسَ اللّٰهُ بِاَعْلَمَ بِالشّٰكِرِيْنَ ۝٥٣

आणि अशाचप्रकारे आम्ही एकाला दुसऱ्याच्या मार्फत अजमाविले आहे; कारण की या लोकांनी म्हणत रहावे, काय हे ते लोक आहेत, की आमच्या सर्वांतून त्यांच्यावर अल्लाहतआलाने आपली कृपा केली आहे[६]. काय ही गोष्ट नाही काय, की अल्लाहतआला कृतज्ञ लोकांना खूप (चांगल्या प्रकारे) जाणतो[७] (५३)

وَاِذَا جَآءَكَ الَّذِيْنَ يُؤْمِنُوْنَ بِاٰيٰتِنَا فَقُلْ سَلٰمٌ عَلَيْكُمْ كَتَبَ رَبُّكُمْ عَلٰى نَفْسِهِ الرَّحْمَةَ ۙ اَنَّهٗ مَنْ عَمِلَ مِنْكُمْ سُوْٓءًا ۢ بِجَهَالَةٍ ثُمَّ تَابَ مِنْ ۢ بَعْدِهٖ وَاَصْلَحَ فَاَنَّهٗ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ۝٥٤

आणि हे लोक जेव्हा आपल्यापाशी येतील जे आमच्या महावाक्यावर ईमान ठेवत असतील, तर असे म्हणून टाका की, तुमच्यावर सलामती असो[८]! तुमच्या पालनकर्त्याने दया करणे आपल्याठायी निश्चित केले आहे[९]; की तुमच्यातून जो मनुष्य वाईट कर्म करून बसेल, अज्ञानामुळे; मग तो याच्यानंतर तौबा करेल आणि सुधारणा करेल, तर अल्लाहची ही शान आहे की तो मोठाच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे[१०] (५४)

وَكَذٰلِكَ نُفَصِّلُ الْاٰيٰتِ وَلِتَسْتَبِيْنَ سَبِيْلُ الْمُجْرِمِيْنَ ۝٥٥ ع ٦/٥/١٢

अशाचप्रकारे आम्ही महावाक्यांचा तपशील करीत राहतो; आणि हे की पापी लोकांचा मार्ग जाहीर होऊन जावा (५५) ६/५/१२

قُلْ اِنِّيْ نُهِيْتُ اَنْ اَعْبُدَ الَّذِيْنَ تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ ۗ قُلْ لَّآ اَتَّبِعُ اَهْوَآءَكُمْ ۙ قَدْ ضَلَلْتُ اِذًا وَّمَآ اَنَا مِنَ الْمُهْتَدِيْنَ ۝٥٦

आपण सांगून टाका की, मला यापासून मना करण्यात आले आहे की (मी) त्यांची उपासना करावी; ज्यांची तुम्ही लोक अल्लाहतआलाला सोडून उपासना करतात. आपण सांगून टाका की, मी तुमच्या मनेच्छेचे अनुपालन करणार नाही, कारण की अशा स्थितीत तर मी मार्गभ्रष्ट होऊन जाईन. आणि सरळमार्गावर चालणाऱ्यांमधून राहणार नाही[११] (५६)

१) म्हणजे त्यांना शिक्षा यासाठी होईल की, त्यांनी नाकारण्याचा आणि खोटे ठरविण्याचा मार्ग अनुसरला होता. अल्लाहचे आज्ञापालन आणि त्याच्या आदेशांची पर्वा केली नव्हती. आणि त्याच्या निषीद्ध आणि मना केलेल्याचा अंगिकार केला; किंबहुना त्याच्या आदेशांना पायदळी तुडविले.

२) माझ्याजवळ अल्लाहचे खजिनेपण नाही. (त्याने अभिप्रेत सर्व प्रकारचे सामर्थ्य आणि शक्ती आहे.) की मी तुम्हास अल्लाहच्या मर्जीशिवाय कोणी असा मोठा चमत्कार सादर करून दाखवू शकेल, जसे की, तुम्ही इच्छितात; ज्याला पाहून तुम्हास माझ्या सत्यतेचा विश्वास पटेल. माझ्याजवळ अदृष्टाचे ज्ञान पण नाही की, भविष्यांत पुढे येणाऱ्या

प्रसंगाची मी तुम्हास जाणीव करून द्यावी. मी देवदूत असल्याचा दावा पण करीत नाही; की तुम्ही मला अशा सवयी विरुद्ध काम करण्यास भाग पाडावे, जे मानवी शक्तीच्या पलीकडे असावे. मी तर फक्त त्या 'वह्यां' चे पालन करणारा आहे, जे माझ्यावर अवतरीत होते. आणि यात हदीससुद्धा आहे, जसे की आपण ﷺ नी फर्माविले, ''मला कुरआनाच्या बरोबर त्याच्या सारखे पण दिले गेले.'' 'हे सारखे' रसूल ﷺ ची हदीसच आहे.

३) म्हणजे आंधळा आणि डोळस, मार्गभ्रष्ट आणि मार्ग सापडलेला आणि विश्वासू आणि काफिर बरोबर होऊ शकत नाही.

४) म्हणजे भिवविण्याचा फायदा अशाच लोकांना होऊ शकतो. नाही तर जे मेल्यानंतर पुन्हा जिवंत होणे, आणि कयामतवर विश्वासच ठेवत नाहीत ते आपल्या 'कुफ्र' आणि अहंकारावरच कायम राहतात. याशिवाय याच्यात या ग्रंथधारी लोकांचे आणि काफिरांचे आणि मुशरिकांचे खंडनपण आहे; जे आपल्या वाडवडीलांना आणि मूर्तींना आपले शिफारसी समजत होते. तसेच कार्यसाधक आणि शिफारसी होणार नाहीचा अर्थ, म्हणजे त्यांच्याकरीता, जे नरकाग्नीच्या शिक्षेसाठी पात्र ठरविले जाऊन चुकले असतील. नाहीतर विश्वासूंसाठी अल्लाहचे पुण्यवान सेवक अल्लाहच्या हुकूमाने शिफारस करतील. म्हणजे शिफारस न करणे कुफ्र आणि शिर्कवाल्यासाठी आहे. आणि याचा हक्क त्या लोकांसाठी आहे, जे गुन्हेगार, विश्वासू-ईमानवाले- व एकेश्वरवादी असतील. अशा प्रकारे दोन्ही प्रकारच्या महावाक्यात कुठल्याही प्रकारचा विरोधाभास (टकराव) राहत नाही.

५) आणि हे आश्रयहीन आणि गरीब मुसलमान जे मोठ्या निर्मळ मनाने, रात्रंदिवस आपल्या पालनकर्त्याला साद घालतात, म्हणजे त्याची उपासना करतात. आपण ﷺ या मुशरिकांच्या टोमणे मारण्यावरून किंवा त्यांच्या मागणीनुसार की, ''हे मुहम्मद! ﷺ तुमच्या आजू बाजूला तर गरीब आणि फकीर लोकांचीच गर्दी असते, जरा त्यांना बाजूला हटवून टाका की, आम्ही सुद्धा तुमच्या सोबत बसू.'' त्या गरीबांना आपल्या जवळून दूर करू नका, विशेषत: आपल्या हिशेबाची जिम्मेदारी त्यांच्यावर नाही; आणि त्यांच्या हिशेबाची जिम्मेदारी तुमच्यावर नाही. जर आपण असे कराल, तर हा अन्याय होईल; जो आपल्या शानला शोभत नाही. उद्देश उम्मतला समजाविणे आहे; की ज्यांचा काही वशीला नाही, अशा लोकांना क्षुल्लक समजणे, त्यांच्या सोबतीला टाळणे आणि त्यांच्याशी संबंध न ठेवणे हे नादानांचे काम आहे; ईमानवाल्यांचे काम नाही. ईमानवाले तर ईमानवाल्यांशी प्रेम करतात; मग जरी ते गरीब आणि दरिद्रीच असले तरी सुद्धा.

६) सुरवातीला बहुतेक गरीब गुलाम प्रकारचेच लोक मुसलमान झाले होते. यासाठी हीच गोष्ट काफिरातील श्रीमंताच्या कसोटीचे साधन बनले. आणि ते या गरीबांची टिंगल पण करीत; आणि ज्यांच्यावर त्यांचे काही चालू शकत होते, त्यांना त्रास आणि इजा देत. आणि म्हणत, ''काय हेच ते लोक आहेत ज्यांच्यावर अल्लाहने उपकार केला?'' उद्देश्य त्यांचा हा होता की, ईमान आणि इस्लाम जर खरोखर अल्लाहचा उपकार असता, तर तो सर्व प्रथम आमच्यावर झाला असता. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जर ही उत्कृष्ट गोष्ट असती तर तिला मान्यता देण्यात, हे आमच्या पेक्षा अग्रेसर न रहाते'''' (सू. अहकाफ -११) म्हणजे त्या कमजोर लोकांच्या तुलनेत आम्ही प्रथम मुसलमान झालो असतो.

७) म्हणजे अल्लाहतआला उघड दिसणारी चमक धमक, थाटमाट आणि श्रीमंती, शान आणि ऐट वैगरे पाहत नाही; तो तर अंत:करणाची अवस्था पाहातो. आणि या अनुषंगाने त्याला ठाऊक आहे की, त्याचे कृतज्ञ सेवक आणि सत्याला ओळखणारे कोण आहेत? बस, मग त्याने ज्यांच्यात कृतज्ञेची भावना पाहिली, त्यांना ईमानच्या खुषनशिबीने, मालामाल करून टाकले, ज्याप्रमाणे हदीस मध्ये येते, ''अल्लाहतआला तुमचे रूप आणि रंग पहात नाही, तो तर तुमची मने आणि तुमची कर्मे पहातो.'' (स.मुस्लीम)

८) म्हणजे त्यांना सलाम करून किंवा त्यांच्या सलामाचे उत्तर देऊन त्यांची इज्जत व मान सन्मान करावा.

९) आणि त्यांना खुषखबरी द्या की, उपकार म्हणून, अल्लाहतआलाने आपल्या कृतज्ञ सेवकांवर आपली दया करण्याचा निर्णय घेऊन ठेवला आहे. ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते की, जेव्हा अल्लाहतआलाने विश्वाची निर्मिती केली. तर त्याने अर्ष (सिंहासन) वर लिहून टाकले, ''माझी कृपादृष्टी माझ्या प्रकोपावर प्रबळ आहे.'' (सहीह बुखारी व स. मुस्लीम)

१०) यात सुद्धा ईमानवाल्यांकरीता खुषखबर आहे, कारण की, यांचेच हे वैशिष्ट आहे की, जर नादानपणाने किंवा मनुष्य स्वभावानुसार काही पाप त्यांच्याकडून होऊन जाते, तर मग लगेच पश्चात्ताप (तौबा) व्यक्त करून, आपली सुधारणा करून घेतात. पापावर अडून राहत नाही आणि पश्चात्ताप करतात.

११) म्हणजे जर मी सुद्धा तुमच्याप्रमाणे अल्लाहची उपासना करण्याऐवजी तुमच्या इच्छेप्रमाणे, अल्लाहशिवाय, इतरांची उपासना सुरू करून देईल; तर खचितच मी पण मार्गभ्रष्ट होऊन जाईन. अर्थ असा की, अल्लाहला सोडून इतरांची उपासना व भक्ती सर्वांत मोठे मार्गभ्रष्ट होणे आहे. परंतु दुर्दैवाने हे मार्गभ्रष्ट होणे, तेवढेच सर्व साधारण पण झाले आहे. येथपावेतो की, मुसलमानांची एक फार मोठी संख्या यात व्यस्त आहे. अल्लाहतआला त्यांना हिदायत देवो! (आमीन)

قُلْ اِنِّیْ عَلٰی بَیِّنَةٍ مِّنْ رَّبِّیْ وَكَذَّبْتُمْ بِهٖ ؕ مَا عِنْدِیْ مَا تَسْتَعْجِلُوْنَ بِهٖ ؕ اِنِ الْحُكْمُ اِلَّا لِلّٰهِ ؕ یَقُصُّ الْحَقَّ وَهُوَ خَیْرُ الْفٰصِلِیْنَ ۝٥٧

**आपण सांगून टाका की, मजजवळ तर एक पुरावा आहे, माझ्या पालनकर्त्याकडून[१] आणि तुम्ही याला खोटे ठरवीत आहांत; ज्या गोष्टींची तुम्ही घाई करीत आहांत; ती माझ्याजवळ नाही. हुकूम अल्लाहतआलाशिवाय[२] कोणाचा नाही. अल्लाहतआला खऱ्या गोष्टीला दाखवून देतो[३]; आणि सर्वांत चांगला निर्णय करणारा तोच आहे. ५७**

قُلْ لَّوْ اَنَّ عِنْدِیْ مَا تَسْتَعْجِلُوْنَ بِهٖ لَقُضِیَ الْاَمْرُ بَیْنِیْ وَبَیْنَكُمْ ؕ وَاللّٰهُ اَعْلَمُ بِالظّٰلِمِیْنَ ۝٥٨

**आपण सांगून टाका की जर माझ्याजवळ ती वस्तू असती, जिची तुम्ही मागणी करीत आहात; तर माझा आणि तुमचा आपसातील मामला निर्णयात्मक होऊन चुकला असता[४]. आणि जालीमांना अल्लाहतआला खूप चांगल्याप्रकारे जाणतो ५८**

وَعِنْدَهٗ مَفَاتِحُ الْغَیْبِ لَا یَعْلَمُهَاۤ اِلَّا هُوَ ؕ وَیَعْلَمُ مَا فِی الْبَرِّ وَالْبَحْرِ ؕ وَمَا تَسْقُطُ مِنْ وَّرَقَةٍ اِلَّا یَعْلَمُهَا وَلَا حَبَّةٍ فِیْ ظُلُمٰتِ الْاَرْضِ وَلَا رَطْبٍ وَّلَا یَابِسٍ اِلَّا فِیْ كِتٰبٍ مُّبِیْنٍ ۝٥٩

**आणि अल्लाहतआला जवळच आहे सर्व गुप्त गोष्टींच्या किल्ल्या, त्यांना अल्लाहतआला शिवाय कोणी जाणत नाही. आणि तो तमाम वस्तूंना जाणतो, जे काही जमिनीत आहे आणि जे काही समुद्रांत आहे. आणि कोणी पान पण गळून पडत नाही, परंतु तो त्याला सुद्धा जाणतो. आणि कोणी दाणा जमिनीच्या अंध:कारमय भागांत पडत नाही; आणि न कोणी ओली, आणि न कोणी कोरडी वस्तू पडते; परंतु हे सर्व एका खुल्या पुस्तकात (लिहिलेले) आहे[५] ५९**

१) अभिप्रेत ते धर्मशास्त्र आहे, जे 'वह्य' च्या मार्फत, आपण ﷺ वर अवतरीत केले गेले; ज्यांत एकेश्वरवादा (तौहीद) ला, प्रथम प्राधान्य देण्यात आले आहे.

२) सर्व विश्वावर अल्लाहतआलाचाच हुकूम चालतो. आणि सर्व प्रकरणे त्याच्याच हातात आहेत. म्हणून तुम्ही जे इच्छितात, की लवकर तुमच्यावर अल्लाहचा प्रकोप यावा, कारण की तुम्हास माझ्या सत्यतेचा किंवा खोटेपणाचा प्रत्यय येऊन जावा. तर हेपण अल्लाहच्याच अधिकारात आहे. तो जर इच्छिल, तर तुमच्या इच्छेप्रमाणे, लवकर शिक्षा पाठवून तुम्हास सावध किंवा बर्बाद करून टाकील, आणि जर इच्छिल तर, त्यावेळेपर्यंत तुम्हास सवलत देईन, जो पर्यंत त्याचे बुद्धिसामर्थ्य किंवा त्याची मर्जी असेल.

३) 'यकुस्सु' कससने आहे, म्हणजे 'यकुस्सु कससल् हक्क' (सत्य गोष्टी दाखवितो किंवा सांगतो) किंवा 'कस्स असरहू ' (कोणाचे मागे चालणे, अनुकरण करणे) ने आहे म्हणजे आपल्या निर्णयांमध्ये तो सत्याचे अनुपालन करतो. म्हणजे सत्यानुसार न्यायनिवाडा करतो. (फत्हुल कदीर)

४) म्हणजे जर अल्लाहतआला माझ्या इच्छेनुसार ताबडतोब शिक्षा पाठवून देता किंवा अल्लाहतआला माझ्या अधिकारांत ही गोष्ट देऊन देता, तर मग तुमच्या इच्छेप्रमाणे शिक्षा पाठवून लवकरच फैसला करून टाकला गेला असता. परंतु ही बाब संपूर्णपणे अल्लाहच्याच मर्जीवर आहे, यासाठी त्याने मला अधिकार दिला नाही, आणि हे ही शक्य नाही, की माझ्या विनंतीवर तो ताबडतोब शिक्षा पाठवून देईन.

**आवश्यक खुलासा :–** हदीसमध्ये जे येते की, एका प्रसंगी अल्लाहच्या हुकूमाने पर्वतांचा देवदूत नबी ﷺ च्या सेवेत हजर झाला, आणि त्याने सांगितले की, जर आपण ﷺ आज्ञा कराल, तर मी सर्व वस्तीला, दोन पर्वतात चेंगरून टाकेल, आपण ﷺ नी सांगितले, ''नाही! किंबहुना मला आशा आहे की, अल्लाहतआला त्यांच्या वंशातून, अल्लाहची उपासना करणारा निर्माण करीन; जो त्याच्याबरोबर कोणाला सरकतदार ठरविणार नाही. (स.बुखारी व स.मुस्लीम) ही हदीस, या महावाक्याच्या खुलाशांच्या विरोधांत नाही. जसे की उघडरीत्या वाटते, यासाठी की या महावाक्यात शिक्षेची मागणी करण्यावर शिक्षा देण्याला जाहीर करणे आहे; जेव्हा की या हदीसमध्ये मुशरिकांच्या इच्छेशिवाय, फक्त त्यांच्या इजा देण्याच्या कारणाने, त्यांना शिक्षा देण्याचा विचार, जाहीर करण्यात आला आहे. ज्याला आपण ﷺ नी पसंत केले नाही.

५)'किताबे मुबीन' ने अभिप्रेत 'लौहे महेफूज' आहे. या महावाक्याने पण ठाऊक झाले की, अदृष्टाचा ज्ञाता फक्त अल्लाहची जात आहे. अदृष्टाचे सर्व खजीने, त्याच्याच जवळ आहेत. याकरीता काफिर, मुशरेकीन आणि धर्माला न मानणाऱ्यांना केव्हा शिक्षा दिली जावी? याचे ज्ञानसुद्धां त्यालाच आहे. आणि तोच आपल्या बुद्धी चातुर्याने याचा निर्णय करणारा आहे. हदीसमध्ये सुद्धा येते की, अदृष्टांच्या चाव्या पाच आहेत.

अ) कयामतचे ज्ञान (ब) पावसाचे पडणे (क) आईच्या गर्भाशयांत वाढणारे मूल (ड) येणाऱ्या उद्यांत घडणाऱ्या घटना आणि (इ) मृत्यू कोठे येईल या पांची गोष्टीचे ज्ञान अल्लाहशिवाय कोणास नाही. (स.बुखारी तफसीर सू.अन्आम)

وَهُوَ الَّذِي يَتَوَفَّاكُم بِاللَّيْلِ وَيَعْلَمُ مَا جَرَحْتُم
بِالنَّهَارِ ثُمَّ يَبْعَثُكُمْ فِيهِ لِيُقْضَىٰ أَجَلٌ مُّسَمًّى ۖ
ثُمَّ إِلَيْهِ مَرْجِعُكُمْ ثُمَّ يُنَبِّئُكُم بِمَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿٦٠﴾

**आणि तो असा आहे की, रात्रींत तो तुमचे प्राण एका अर्थाने हरण करून घेतो[१]; आणि जे काही तुम्ही दिवसा करता, त्याला तो जाणतो. मग तुम्हास जागवून उठवितो[२]; अशासाठी की ठरलेला काळ, पूर्ण करून द्यावा.[३] मग त्याच्याकडे तुम्हांस परतून जाणे आहे[४]. मग तो तुम्हास दाखवील, जे काही तुम्ही करीत होता** ६०

وَهُوَ الْقَاهِرُ فَوْقَ عِبَادِهِ ۖ وَيُرْسِلُ عَلَيْكُمْ حَفَظَةً
حَتَّىٰ إِذَا جَاءَ أَحَدَكُمُ الْمَوْتُ تَوَفَّتْهُ رُسُلُنَا وَهُمْ
لَا يُفَرِّطُونَ ﴿٦١﴾

**आणि तोच आपल्या सेवकांवर प्रबळ आहे, वरचढ आहे. आणि तुमच्यावर पहारा ठेवणारे (दूत) पाठवितो; येथपावेतो की,जेव्हा तुमच्यातून कोणास मृत्यू येऊन पोहचतो, त्याच्या प्राणाला आम्ही पाठविलेले (देवदूत) हरण करून घेतात. आणि ते जराही हलगर्जीपणा करीत नाहीत[५]** ६१

ثُمَّ رُدُّوا إِلَى اللَّهِ مَوْلَاهُمُ الْحَقِّ ۚ أَلَا لَهُ الْحُكْمُ
وَهُوَ أَسْرَعُ الْحَاسِبِينَ ﴿٦٢﴾

**नंतर मग सर्व लोक आपल्या खऱ्या मालकाकडे (अल्लाहकडे) आणले जातील[६]; नीट ऐकून ठेवा, निर्णय अल्लाहचाच चालेल आणि तो फार लवकर हिशेब घेणारा आहे** ६२

१) येथे झोपेला मृत्यू समान ठरविले गेले आहे. यासाठी झोपेला छोटा मृत्यू आणि मृत्यूला मोठा मृत्यू म्हणण्यात येते. (मृत्यूच्या खुलाशांसाठी पहा सू. आले इमरान आ.क्र.५५ चा समास)

२) म्हणजे दिवसाच्या वेळी, प्राण परत पाठवून जिवंत करून देतो.

३) म्हणजे हा क्रम रात्र व दिवस आणि लहान मृत्यूची भेट होऊन दिवसाला पुन्हा उठून उभे होण्याचा नित्यनेम माणसाच्या मोठ्या मृत्यूपर्यंत चालू राहील.

४) म्हणजे पुन्हा कयामतच्या दिवशी, जिवंत होऊन सर्वांना अल्लाहच्या समक्ष हजर होणे आहे.

५) म्हणजे आपल्या या हवाली केलेल्या कामात आणि आत्म्याच्या संरक्षणात तो देवदूत, मरणारा जर पुण्यवान असेल, तर त्याचा प्राण 'इल्लीयीन' मध्ये, आणि जर पापी असेल, तर 'सिज्जीन' मध्ये पाठवून देतो.

६) महावाक्यांत 'रूद्दु' (परत फिरवले जाल) ने अभिप्रेत काहींनी देवदूतांना ठरवले आहे. म्हणजे प्राण हरण केल्यानंतर देवदूत अल्लाहच्या समक्ष परत जातात. आणि काहींनी याचा मर्जा, सर्व लोकांना बनविले आहे; म्हणजे सर्व लोक हशर नंतर अल्लाहकडे परत फिरविले जातील. (पेश केले जातील) आणि मग तो सर्वांचा न्याय निवाडा करीन. या महावाक्यांत प्राण हरण करणाऱ्या देवदूतांना 'रसुल' (रसूलच्या अनेकवचनासह) म्हणून वर्णन करण्यात आले आहे. ज्याने स्पष्ट ठाऊक होते की, प्राण हरण करणारा देवदूत एक नसून अनेक आहेत. याचा खुलासा, काही भाष्यकारांनी अशा प्रकारे केला आहे की, कुरआन मजीदमध्ये प्राण हरण करण्याचा संबंध अल्लाहकडे सुद्धा आहे. ''अल्लाह लोकांच्या मृत्यूच्यावेळी, त्यांचे प्राण हरण करून घेतो.'' (सू. ज़ुमर - ४२) आणि याचा संबंध एक देवदूत (मलकुल मौत) कडे सुद्धा केला गेला आहे. ''सांगून टाका, तुमचे प्राण, तो मृत्यूचा देवदूत, हरण करीतो, जो तुमच्यासाठी निश्चित केला गेला आहे.'' (सू. अलीफ लाम मीम सजदा-११) आणि याचा संबंध वेगवेगळ्या देवदूतांशी पण जोडला गेला आहे; जसे की या ठिकाणी आहे. आणि अशाच प्रमाणे सू.निसा आ.९७ आणि सू. अल् अन्आम आ.९३ मध्येपण आहे. म्हणून अल्लाहकडे याचा संबंध अशा दृष्टीने आहे की, तोच मूळ आज्ञा देणारा, आहे. निरनिराळ्या देवदूतांकडे संबंध अशा दृष्टीने आहे की, ते मलकुल मौतचे मददगार आहेत. ते नसातून लहान लहान धमन्यांतून आणि पाठीतून प्राण काढण्याला, आणि त्याचा (प्राणाचा) संबंध या सर्व वस्तूंपासून तोडण्याचे काम करतात; आणि मलकुल मौतेशी संबंधाचा अर्थ, हा आहे की, मग शेवटी तो प्राण हरण करून, आकांशाकडे घेऊन जातो. (तफसीर रुहुल मआनी जिल्द ५ पृ.१२५) हाफीज इब्ने कसीर, इमाम शौकानी आणि बहुतेक धर्मपंडीत या गोष्टीला मान्य करतात, की, मलकुल मौत एकच आहे. जसे की, सू.अलीफ लाम मीम सजदाच्या महावाक्याने आणि मुसनद अहमद मध्ये ह.बराअ बिन आजिब ﷺ च्या हदीसने ठाऊक होते. आणि जेथे अनेक वचनांत त्यांचा उल्लेख आहे. तर ते त्याचे सहाय्यक आणि मददगार आहेत. आणि काही सहाबा ﷺ च्या म्हणण्याप्रमाणे मलकुल मौतचे नांव 'इज़राईल' दाखविण्यात आले आहे. (तफसीर इब्ने कसीर सू. अलीफ लाम मीम सजदा) वल्लाह् अअलम्.

| | |
|---|---|
| قُلْ مَنْ يُّنَجِّيْكُمْ مِّنْ ظُلُمٰتِ الْبَرِّ وَالْبَحْرِ تَدْعُوْنَهٗ تَضَرُّعًا وَّخُفْيَةً ۚ لَئِنْ اَنْجٰىنَا مِنْ هٰذِهٖ لَنَكُوْنَنَّ مِنَ الشّٰكِرِيْنَ ﴿٦٣﴾ | **आपण (सल्ल.) यांना विचारा की, तो कोण आहे जो तुम्हास जमीन आणि समुद्राच्या अंध:कारातून मुक्ती देतो? तुम्ही त्याला गहिवरून (गहिवरून) आणि मुकाट्याने साद घालतात; की जर तूआम्हास यापासून सुटका करून देशील, तर आम्ही जरूर तुझे आभार प्रदर्शक (सेवक) होऊन राहू ६३** |
| قُلِ اللّٰهُ يُنَجِّيْكُمْ مِّنْهَا وَمِنْ كُلِّ كَرْبٍ ثُمَّ اَنْتُمْ تُشْرِكُوْنَ ﴿٦٤﴾ | **आपण सांगून टाका की, अल्लाहच तुम्हाला यांचेपासून सुटका देतो. आणि प्रत्येक दु:खापासून (पण सुटका देतो); तरी सुद्धा तुम्ही शिर्क करू लागतात ६४** |
| قُلْ هُوَ الْقَادِرُ عَلٰٓى اَنْ يَّبْعَثَ عَلَيْكُمْ عَذَابًا مِّنْ فَوْقِكُمْ اَوْ مِنْ تَحْتِ اَرْجُلِكُمْ اَوْ يَلْبِسَكُمْ شِيَعًا وَّيُذِيْقَ بَعْضَكُمْ بَاْسَ بَعْضٍ ۗ اُنْظُرْ كَيْفَ نُصَرِّفُ الْاٰيٰتِ لَعَلَّهُمْ يَفْقَهُوْنَ ﴿٦٥﴾ | **आपण (सल्ल.) सांगून टाका की, यावरही तो समर्थ आहे की, तुमच्यावर कोणी प्रकोप तुमच्यावरून पाठवून द्यावा[१]; किंवा तुमच्या पायाखालून[२] किंवा की तुमचे गट गट करून, सर्वांची जुंपवून देईल आणि तुमच्यातून कित्येकांस कित्येकांच्या लढाईची गोडी चाखवून देईन[३]. आपण पहा तर खरे, आम्ही कशाप्रकारे प्रमाणांना फिरवून फिरवून वर्णन करितो, की कदाचित् त्यांनी समजाव्या ६५** |
| وَكَذَّبَ بِهٖ قَوْمُكَ وَهُوَ الْحَقُّ ۭ قُلْ لَّسْتُ عَلَيْكُمْ بِوَكِيْلٍ ﴿٦٦﴾ | **आणि आपले लोक याला[४] खोटे ठरवतात वास्तविक पाहता ते सत्य (हक) आहे. आपण सांगून टाका की, मी तुमच्यावर रक्षक म्हणून तर नाहीच[५] ६६** |
| لِكُلِّ نَبَاٍ مُّسْتَقَرٌّ ۡ وَّسَوْفَ تَعْلَمُوْنَ ﴿٦٧﴾ | **प्रत्येक गोष्टीचा घडण्याचा एक वेळ निश्चित आहे; आणि लवकरच तुम्हास ठाऊक होऊन जाईल ६७** |

१) म्हणजे आकाशातून अति पाऊस किंवा सोसाट्याचा वारा, दगडांमार्फत प्रकोप, किंवा सत्ताधाऱ्यांकडून जुलूम आणि अत्याचार.

२) जसे जमिनीत धसवून दिले जाणे, महापूर, ज्यांत सर्व काही बुडून जाणे. किंवा अभिप्रेत आहे, अधिनस्थ लोकांकडून गुलामाकडून आणि नोकर-चाकराकडून शिक्षा की ते बेईमान आणि लबाडी करणारे होऊन जावेत.

३) 'यलबिसकुम' अर्थात तुमच्या प्रकरणाला सरमिसळ किंवा शंकास्पद करून टाकेन, ज्यामुळे तुम्ही गटागटांत आणि समूहा समूहात विभागले जावेत. तुमच्यातल्या एकाने, दुसऱ्याला ठार करावे, अशा प्रकारे प्रत्येक गटाने दुसऱ्या गटाला युद्धाची गोडी चाखवावी. (अयसरूत्तफासीर) हदीस मध्ये येते, नबी ﷺ नी सांगितले की, मी अल्लाहतआलाजवळ तीन दुआ केल्या १) माझी उम्मत बुडवून नष्ट न केली जावी. २)सार्वत्रिक दुष्काळामुळे, तिची बर्बादी न होवो ३) आपसात त्यांच्यात लढाई होऊ नये. अल्लाहतआलाने पहिल्या दोन दुआ कबूल केल्या. आणि तिसऱ्या दुआने मला मना केले. (स.मुस्लीम) म्हणजे अल्लाहतआलाच्या ज्ञानांत ही गोष्ट होती की, उम्मते मोहम्मदीयामध्ये मतभेद होतील; आणि त्याचे कारण अल्लाहचा आज्ञाभंग आणि कुरआन व हदीसहून तोंड फिरवणे असेल. ज्याच्या परिणामांत शिक्षेच्या या प्रकारापासून, उम्मते मोहम्मदीया पण सुरक्षित राहू शकणार नाही. जणू याचा संबंध, अल्लाहच्या त्या सुन्नतशी आहे, जो समाजांच्या चारीत्र्य आणि कर्तृत्वाच्या बाबतीत नेहमी राहिला आहे. ज्यांच्यात बदल होणे शक्य नाही. ''तर आपण अल्लाहच्या दस्तूरला (सुन्नतला) कधी बदलणारा पावणार नाही, आणि आपण अल्लाहच्या दस्तूरला कधी पुढे स्थलांतर झालेला पावणार नाही.'' (सू. फातिर - ४३)

४) 'बिही' चा मर्जा कुरआन आहे. किंवा शिक्षा. (फत्हुल कदीर)

५) म्हणजे मला या कामाला जबाबदार ठरविले गेले नाही. की, मी तुम्हाला सरळ मार्गावर लावूनच सोडावे; किंबहुना माझे काम फक्त आवाहन आणि प्रचार आहे आणि ''जो इच्छेल त्याने ईमान आणावे; आणि जो इच्छेल त्याने 'कुफ्र' करावे.'' (सू.कहफ - २९)

وَإِذَا رَأَيْتَ الَّذِينَ يَخُوضُونَ فِي آيَاتِنَا فَأَعْرِضْ عَنْهُمْ حَتَّىٰ يَخُوضُوا فِي حَدِيثٍ غَيْرِهِ ۚ وَإِمَّا يُنسِيَنَّكَ الشَّيْطَانُ فَلَا تَقْعُدْ بَعْدَ الذِّكْرَىٰ مَعَ الْقَوْمِ الظَّالِمِينَ ﴿٦٨﴾

आणि जेव्हा आपण असे लोक पाहाल; जे आमच्या निशाण्यांची थट्टा व टवाळकी करीत आहे, तर त्यांच्यापासून दूर होऊन जा; येथ पावेतो की, ते आणखी कोण्या गोष्टीत लागून जातील, आणि आपणास जर शैतान विसर पाडून टाकेन, तर आठवण झाल्यानंतर मग, अशा अन्यायी लोकांसोबत बसू नका[१] ﴿६८﴾

وَمَا عَلَى الَّذِينَ يَتَّقُونَ مِنْ حِسَابِهِم مِّن شَيْءٍ وَلَٰكِن ذِكْرَىٰ لَعَلَّهُمْ يَتَّقُونَ ﴿٦٩﴾

आणि जे लोक (अल्लाहला) भिऊन चालतात; त्यांच्यावर अशा लोकांच्या हिशेबाची कसलीच जबाबदारी नाही[२]; परंतु त्यांच्यावर उपदेश करून देणे आहे. की कदाचित् ते पण (अल्लाहला) भिऊन वागू लागतील[३] ﴿६९﴾

وَذَرِ الَّذِينَ اتَّخَذُوا دِينَهُمْ لَعِبًا وَلَهْوًا وَغَرَّتْهُمُ الْحَيَاةُ الدُّنْيَا ۚ وَذَكِّرْ بِهِ أَن تُبْسَلَ نَفْسٌ بِمَا كَسَبَتْ لَيْسَ لَهَا مِن دُونِ اللَّهِ وَلِيٌّ وَلَا شَفِيعٌ وَإِن تَعْدِلْ كُلَّ عَدْلٍ لَّا يُؤْخَذْ مِنْهَا ۗ أُولَٰئِكَ الَّذِينَ أُبْسِلُوا بِمَا كَسَبُوا ۖ لَهُمْ شَرَابٌ مِّنْ حَمِيمٍ وَعَذَابٌ أَلِيمٌ بِمَا كَانُوا يَكْفُرُونَ ﴿٧٠﴾

आणि अशा लोकांकडून अगदी अलिप्त होऊन जा; ज्यांनी आपल्या धर्माला खेळ व तमाशा बनवून ठेवले आहे; आणि इहलौकीक आयुष्याने त्यांना फसवणूकीत घालून ठेवले आहे आणि या कुरआनामार्फत त्यांना उपदेश पण करीत रहा. कारण की कोणी मनुष्य आपल्या कर्मामुळे अशा प्रकारे फसून जावा[४] की, कोणी अल्लाहशिवाय त्याचा मददगार आणि शिफारसी न व्हावा. आणि अशी स्थिती होईल की, दुनियाभरचे मोबदले देऊन टाकले; तरी त्याचे जवळून कबूल केले जाणार नाही[५]. हे असेच आहेत की, आपल्या कर्मामुळे फसून गेले. यांच्यासाठी उकळते पाणी पिण्यासाठी असेल, आणि यातनादायक शिक्षा असेल, त्यांच्या 'कुफ्र' मुळे ﴿७०﴾

१) महावाक्यांत संबोधन जरी, नबी ﷺ ला आहे; परंतु संबोधित उम्मते मुसलिमाची प्रत्येक व्यक्ती आहे. हा अल्लाहतआलाचा एक ताकीदी हुकूम आहे; ज्याला कुरआन मजीद मध्ये बऱ्याच ठिकाणी वर्णन करण्यांत आले आहे. सू. निसा आ.क्र.१४० मध्ये सुद्धा, हा विषय येऊन चुकला आहे. याच्याने प्रत्येक ती बैठक अभिप्रेत आहे, जेथे अल्लाह आणि त्याच्या रसूलच्या हुकूमाची थट्टा आणि टिंगल केली जात असेल. किंवा कृतीने त्यांना कमी लेखले जात असेल. किंवा बिढअतवाले, आणि धर्मात अपूर्णता मानणारे आपल्या कमजोर शैली वर्णन करणारे आणि नादान दलील देणारे आणि त्याचे मार्फत अल्लाहच्या महावाक्यांत तोडमोड करत असावे. अशा बैठकांमध्ये, चुकीच्या गोष्टींवर टिका करणे, आणि सत्त्याचा आवाज उंच करण्याच्या इरादाने भाग घेणे तर योग्य आहे; अन्यथा दुसऱ्या कुठल्याही स्वरूपांत मोठे पाप, आणि अल्लाहच्या क्रोधाला कारणीभूत आहे.

२) 'मिन हिसाबेहिम' चा संबंध, अल्लाहच्या महावाक्यांची टिंगल करणाऱ्या बरोबर आहे. म्हणजे जे लोक अशा बैठकीपासून दूर राहतील, तर अल्लाहच्या महावाक्यांची टिंगल करणाऱ्यांना जे पातक लागले, ते या पातकापासून सुरक्षित राहतील.

३) म्हणजे वाचणे आणि वेगळे राहून सुद्धा, जो हितोपदेश आणि भलाईचा हुकूम करणे आणि वाईट कामांपासून मना करणेचे कर्तव्य यथाशक्ती करीत राहिले. कदाचित् ते सुद्धा, आपल्या या वर्तणुकीने परावृत्त व्हावेत.

४) 'तुबसल' बसलचा खरा अर्थ तर, मना करण्याचा आहे. 'शुजाअुन बासेलुन' परंतु येथे याचे वेगवेगळे अर्थ केले गेले आहेत.
१) तुसल्लिमू (आधिन करून दिले जावे) २) तुफजहू (फजीत करून दिले जावे.) ३) तुवाखजू (जवाब मागितला जावा) ४) तुजाजा (मोबदला दिला जावा) इमाम इब्ने कसीर म्हणतात, सर्वांचे अर्थ जवळ जवळ सारखेच आहेत. खुलासा हा आहे की, त्यांना या कुरआनामार्फत उपदेश केला जावा. कोठे असे न व्हावे की, जीवाला, जे त्याने कमाविले, त्याच्या बदल्यात त्याला बर्बाद केले जावे किंवा फजीती त्याचा दैवयोग होऊन जावा, किंवा तो उत्तरदायित्व किंवा कायद्याच्या पकडीत येऊन जावा. या सर्व विषयांना, विद्वान भाषांतरकाराने ''फसून न जावे'' ने अभिप्रेत केले आहे.

५) या जगात मनुष्य सर्व साधारणपणे, कोण्या मित्राची मदत, किंवा कोणाच्या शिफारसीने किंवा आर्थिक मोबदला देऊन, आपली सुटका करून घेतो परंतु परलोकांत या तिन्ही गोष्टी कामा येणार नाहीत. तेथे काफिरांचा कोणी मित्र असणार नाही; जो त्यांना अल्लाहच्या पकडीपासून सोडवेल तसेच कोणी शिफारीशकर्तापण असणार नाही जो त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून मुक्ती मिळवून देईल. तसेच आर्थिक मोबदला देण्यासाठी कोणाजवळ काही नसेल आणि समजा असले तरी ते कबूल केले जाणार नाही की, ते देऊन त्यांनी सुटून जावे. हा विषय कुरआन मजीदमध्ये अनेक ठिकाणी वर्णन करण्यात आला आहे.

قُلْ أَنَدْعُوا مِنْ دُوْنِ اللّٰهِ مَا لَا يَنْفَعُنَا وَلَا يَضُرُّنَا
وَنُرَدُّ عَلٰٓى اَعْقَابِنَا بَعْدَ اِذْ هَدٰىنَا اللّٰهُ كَالَّذِى
اسْتَهْوَتْهُ الشَّيٰطِيْنُ فِى الْاَرْضِ حَيْرَانَ لَهٗٓ اَصْحٰبٌ
يَّدْعُوْنَهٗٓ اِلَى الْهُدَى ائْتِنَا ؕ قُلْ اِنَّ هُدَى اللّٰهِ
هُوَ الْهُدٰى ؕ وَاُمِرْنَا لِنُسْلِمَ لِرَبِّ الْعٰلَمِيْنَ ﴿٧١﴾

आपण सांगून टाका की, काय आम्ही अल्लाहतआलाशिवाय अशा वस्तूशी प्रार्थना करावी, की जी न आम्हाला नफा पोहचवीन आणि न आम्हाला नुकसान पोहचवील, आणि काय आम्ही उलट फिरून जावे, याच्यानंतर की, अल्लाहतआला ने आम्हाला सरळमार्ग दाखवून दिला आहे. जसा कोणी मनुष्य असावा, की ज्याला शैतानानी कोण्या जंगलात मार्गभ्रष्ट करून टाकले असावे; आणि तो भटकत फिरत असेल; त्याचे काही साथीदारपण असावेत, की जे त्याला योग्य मार्गाकडे बोलवत असावेत, की आमच्याकडे ये(१). आपण सांगून टाका की, खरी गोष्ट आहे की, योग्य मार्ग हा खास अल्लाहचाच मार्ग आहे;(२) आणि आम्हास हा हुकूम झाला आहे की, आम्ही सकल जगाच्या पालनकर्त्याचे पूर्ण आज्ञांकित होऊन जावे ७१

وَاَنْ اَقِيْمُوا الصَّلٰوةَ وَاتَّقُوْهُ ؕ وَهُوَ الَّذِىْٓ اِلَيْهِ
تُحْشَرُوْنَ ﴿٧٢﴾

आणि हे की नमाजीला कायम करा.आणि त्याला भ्या(३); आणि तोच आहे ज्याच्याजवळ, तुम्ही सर्व गोळा केले जाल ७२

وَهُوَ الَّذِىْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ بِالْحَقِّ ؕ
وَيَوْمَ يَقُوْلُ كُنْ فَيَكُوْنُ ؕ۬ قَوْلُهُ الْحَقُّ ؕ وَلَهُ
الْمُلْكُ يَوْمَ يُنْفَخُ فِى الصُّوْرِ ؕ عٰلِمُ الْغَيْبِ وَالشَّهَادَةِ ؕ
وَهُوَ الْحَكِيْمُ الْخَبِيْرُ ﴿٧٣﴾

आणि तोच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला (कोण्या) सत्य संकल्पनेत निर्माण केले(४); आणि(५) जेव्हा अल्लाहतआला एवढे म्हणून टाकीन की, तू होऊन जा; बस ते होऊन जाईल. त्याचे म्हणणे सत्य (अटल)आहे. आणि सारी सत्ता खास त्याचीच राहील; जेव्हा की करणामध्ये (सूर) फुक मारली जाईल(६). तो अदृष्ट आणि दृष्ट वस्तूंचा जाणणारा आहे. आणि तोच युक्तीवान आणि पूर्ण माहितगार आहे ७३

وَاِذْ قَالَ اِبْرٰهِيْمُ لِاَبِيْهِ اٰزَرَ اَتَتَّخِذُ اَصْنَامًا اٰلِهَةً ۚ
اِنِّىْٓ اَرٰىكَ وَقَوْمَكَ فِىْ ضَلٰلٍ مُّبِيْنٍ ﴿٧٤﴾

आणि (तो समय पण आठवण करण्याच्या योग्य आहे,) जेव्हा इब्राहीम (अ.) ने आपला बाप 'आझरला'(७) विचारले काय तू मूर्तींना उपास्य ठरवितो? नि:संशय मी तुला आणि तुझ्या सर्व लोकांना धडधडीत चुकीत पडलेले पहात आहे ७४

وَكَذٰلِكَ نُرِىْٓ اِبْرٰهِيْمَ مَلَكُوْتَ السَّمٰوٰتِ
وَالْاَرْضِ وَلِيَكُوْنَ مِنَ الْمُوْقِنِيْنَ ﴿٧٥﴾

आणि आम्ही अशाचप्रकारे इब्राहीम (अ.) ला आकाशांची आणि पृथ्वीची राज्य व्यवस्था दाखविली आणि अशांसाठी की पूर्ण विश्वास बाळगणाऱ्यांमधून होऊन जावे(८) ७५

فَلَمَّا جَنَّ عَلَيْهِ الَّيْلُ رَاٰ كَوْكَبًا ۚ قَالَ هٰذَا رَبِّىْ ۚ
فَلَمَّآ اَفَلَ قَالَ لَآ اُحِبُّ الْاٰفِلِيْنَ ﴿٧٦﴾

मग जेव्हा रात्रीचा अंध:कार त्यांच्यावर पसरून गेला; तेव्हा त्यांनी एक (चमकता) तारा पाहिला. आपण सांगितले, की हा माझा पालनकर्ता आहे, परंतु जेव्हा अस्तास गेला, तेव्हा आपण सांगितले की, मी अस्त पावणाऱ्यांशी प्रेम करीत नाही(९) ७६

فَلَمَّا رَاَ الْقَمَرَ بَازِغًا قَالَ هٰذَا رَبِّىْ ۚ فَلَمَّآ
اَفَلَ قَالَ لَئِنْ لَّمْ يَهْدِنِىْ رَبِّىْ لَاَكُوْنَنَّ
مِنَ الْقَوْمِ الضَّآلِّيْنَ ﴿٧٧﴾

मग जेव्हा चंद्राला पाहिले चमकतांना, सांगितले की, हा माझा पालनकर्ता आहे. परंतु जेव्हा तो अस्तास गेला, तेव्हा आपण सांगितले की जर मला माझ्या पालनकर्त्याने मार्गदर्शन केले नाही; तर मी मार्गभ्रष्ट लोकांमध्ये शामील होऊन जाईल ७७

१) हे त्या लोकांचे उदाहरण देण्यात आले आहे, जे ईमानच्या नंतर 'कुफ्र' आणि तौहीद (एकेश्वरवादा) च्या नंतर 'शिर्क' कडे पलटून जातील. त्यांचे उदाहरण असेच आहे की, एक मनुष्य आपल्या साथीदारांकडून भटकून जाईल. जे सरळ मार्गावर चालत आहेत. आणि भटकून जाणारा, जंगलामधून हैराण आणि परेशान होऊन भटकत फिरत असेल; त्याचे साथीदार त्याला बोलावत असतील, परंतु हैराणीमुळे त्याला काही सुचत नसेल. किंवा जिन्नतांच्या जाळ्यांत फसून गेल्यामुळे योग्य मार्गाला लागणे त्याला शक्य राहिले नसेल.

२) अर्थ असा आहे की, कुफ्र आणि शिर्क अंगिकारून जो मार्गभ्रष्ट होऊन गेला आहे, तो चुकलेल्या मुसाफीरासारखा, मार्गदर्शनाकडे येऊ शकत नाही. हां.! तथापि जर अल्लाहतआलाने हिदायत त्याच्या दैवात ठेवली असेल, तर तो नक्कीच अल्लाहच्या इच्छेने मार्ग मिळवणारा होऊन जाईल. कारण की हिदायतवर चालून देणे, त्याचेच (अल्लाहचेच) काम आहे. जसे दुसऱ्या ठिकाणांवर सांगितले गेले, ''जर तू त्यांच्या हिदायतची इच्छा बाळगतो (तर काय?) नि:संशय अल्लाह त्याला हिदायत देत नाही; ज्याला तो मार्गभ्रष्ट करून टाकेन. आणि त्यांचा कोणी मददगार होणार नाही.'' (सू. नहल - ३७) तथापि ही हिदायत आणि मार्गभ्रष्ट होणे, याच तत्त्वाखाली होते. जे अल्लाहतआलाने त्याच्यासाठी बनविले आहे. हे असे नाही की, असेच, तो ज्याला इच्छेल त्याला मार्गभ्रष्ट करून टाकीन, आणि ज्याला इच्छेल त्याला सरळ मार्गाला लावून देईन. जसे की याचे स्पष्टीकरण अनेक ठिकाणी केले जाऊन चुकले आहे.

३) 'व अन अकिमु' चा 'अतफ' लिनुस्लिमा' वर आहे. म्हणजे आम्हास हुकूम दिला गेला आहे की, आम्ही सकल जगाच्या पालनकर्त्याचे अंकित होऊन जावे. आणि हे की, आम्ही नमाजीला कायम करावे; आणि त्याला भ्यावे. अल्लाहच्या अंकित होऊन गेल्यावर, सर्वात पहिला हुकूम नमाज कायम करण्याचा दिला गेला आहे. ज्यामुळे नमाजीचे महत्त्व स्पष्ट होते. आणि याच्या नंतर ईशभयाचा हुकूम आहे की, नमाजचे कायम करणे, ईशभय आणि नम्रता व व्याकुळतेशिवाय शक्य नाही. ''व इन्नहा लकबीरतून इल्ला अलल् खाशे अिन'' (सू. बकर: - ४५) ''ही मोठी गोष्ट आहे, परंतु ईशभय बाळगणाऱ्यांवर''

४) सत्त्याने किंवा सत्य संकल्पनाने निर्माण केले. म्हणजे खेळ व तमाशा म्हणून निर्माण केले नाही. किंबहुना एका खास उद्देशाने ब्रह्मांडाची निर्मिती केलीआहे. आणि तो हा की, अल्लाहचे स्मरण केले जावे; आणि त्याचे आभार मानले जावे; ज्याने हे सर्व काही बनविले.

५) म्हणजे त्या दिवसाला आठवण करा; किंवा त्या दिवसाला भ्या! की त्याचा शब्द 'कुन' (होऊन जा) ने तो जे इच्छील, ते होऊन जाईल. हा इशारा आहे त्या गोष्टीकडे की, हिशेब घेण्याची कठीण अवस्था पण, मोठ्या शिघ्रतेने, पार पडून जाईल. परंतु कोणासाठी, ईमानवाल्यांसाठी. दुसऱ्यांना तर हा दिवस एक हजार वर्षे किंवा पन्नास हजार वर्षे दिर्घ वाटेल.

६) 'सूर' ने अभिप्रेत नरसिंगा किंवा बिगुल आहे. ज्याच्या संबंधी हदीसमध्ये येते की, ''इसराफिल, त्याला तोंडात धरून, आणि नतमस्तक होऊन, अल्लाहच्या आज्ञेच्या प्रतिक्षेत उभे आहेत की, जेव्हा त्यांना सांगितले जाईल, तर त्याला फुक मारून घ्यावी. (इब्ने कसीर) अबुदाऊद तिर्मिजीमध्ये आहे, 'सूर एक कर्णा' (नरसिंगा) आहे, ज्यात फुंक मारली जाईल. काही धर्मपंडितांजवळ, तीन वेळा सूर फुंकला जाईल. नफखतुल्सअक, (ज्याने सर्व लोक बेशुद्ध होऊन जातील.) नफखतुल फना ज्याने सर्व लोक नष्ट होऊन जातील. नफखतुल इन्शा - ज्याने सर्व मनुष्य मात्र दुसऱ्यांदा जिवंत होऊन जातील. काही धर्मपंडित शेवटच्या दोन फुंकण्याला मान्यता देतात.

७) इतिहासकार ह.इब्राहीम عليه السلام च्या वडीलांची दोन नांवे वर्णन करतात. आजर आणि तारख. शक्य आहे दुसरे नाव टोपन नाव असावे.

८) मलकूत - याच्याने अभिप्रेत निरनिराळ्या निर्मिती आहेत. जसा की भाषांतरात हाच अर्थ अंगिकारला गेला आहे. किंवा स्वामित्व आणि उपास्यत्व आहे. म्हणजे आम्ही त्याला ही दाखविली आणि अल्लाहला ओळखण्याची सुबुद्धी दिली. किंवा हा अर्थ आहे की, अर्ष (अल्लाहचे महासिंहासन) पासून, पृथ्वीच्या अगदी शेवटच्या तळापर्यंत आम्ही ह.इब्राहीम عليه السلام ला सर्व प्रत्यक्ष दाखवून दिले. (फत्हुल कदीर)

९) म्हणजे अस्त पावणाऱ्या उपास्यांना मी पसंत करीत नाही. यासाठी की, अस्त, स्थिती बदलावर संकेत करतो. जी पुन्हा नवीन उगवण्यावर पुरावा आहे. आणि जो नवनिर्मित आहे, तो उपास्य होऊ शकत नाही.

فَلَمَّا رَاَ الشَّمۡسَ بَازِغَةً قَالَ هٰذَا رَبِّىۡ هٰذَاۤ اَكۡبَرُ‌ ۚ فَلَمَّاۤ اَفَلَتۡ قَالَ يٰقَوۡمِ اِنِّىۡ بَرِىۡٓءٌ مِّمَّا تُشۡرِكُوۡنَ ﴿٧٨﴾

मग जेव्हा सूर्याला चमकतांना पाहिले, तेव्हा सांगितले की, हा[१] माझा पालनकर्ता आहे. हा तर सर्वात मोठा आहे. मग जेव्हा तो पण अस्तास गेला, तेव्हा आपण सांगितले नि:संशय मी तुमच्या शिर्कपासून अलिप्त आहे[२] ७८

اِنِّىۡ وَجَّهۡتُ وَجۡهِىَ لِلَّذِىۡ فَطَرَ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضَ حَنِيۡفًا‌ وَّمَاۤ اَنَا مِنَ الۡمُشۡرِكِيۡنَ‌ ﴿٧٩﴾

मी एकाग्र होऊन आपले तोंड त्याचेकडे करतो[३], ज्याने आकाशांना आणि पृथ्वीला निर्माण केले, आणि मी शिर्क करणाऱ्यांमधून नाही ७९

وَحَآجَّهٗ قَوۡمُهٗ‌ ؕ قَالَ اَتُحَآجُّوْٓنِّىۡ فِى اللّٰهِ وَقَدۡ هَدٰٮنِ‌ ؕ وَلَاۤ اَخَافُ مَا تُشۡرِكُوۡنَ بِهٖۤ اِلَّاۤ اَنۡ يَّشَآءَ رَبِّىۡ شَيۡـــًٔا‌ ؕ وَسِعَ رَبِّىۡ كُلَّ شَىۡءٍ عِلۡمًا‌ ؕ اَفَلَا تَتَذَكَّرُوۡنَ ﴿٨٠﴾

आणि त्यांच्याशीच त्यांच्या लोकांनी वितंडवाद करण्यास[४] सुरूवात केली. त्यांनी सांगितले काय तुम्ही अल्लाहच्या मामल्यात माझ्याशी वाद घालीत आहात? वास्तविक त्याने मला मार्ग दाखवून दिला आहे. आणि मी त्या वस्तूंपासून ज्यांना तुम्ही अल्लाहचा सरकतदार ठरवत आहात, भीत नाही. परंतु माझा पालनकर्ताच काही इच्छिल. माझा पालनकर्ता आपल्या ज्ञानाने प्रत्येक वस्तूला घेरून आहे. तर काय तुम्ही विचार करीत नाही ८०

وَكَيۡفَ اَخَافُ مَاۤ اَشۡرَكۡتُمۡ وَلَا تَخَافُوۡنَ اَنَّكُمۡ اَشۡرَكۡتُمۡ بِاللّٰهِ مَا لَمۡ يُنَزِّلۡ بِهٖ عَلَيۡكُمۡ سُلۡطٰنًا‌ ؕ فَاَىُّ الۡـفَرِيۡقَيۡنِ اَحَقُّ بِالۡاَمۡنِ‌ ۚ اِنۡ كُنۡتُمۡ تَعۡلَمُوۡنَ‌ۘ ﴿٨١﴾

आणि मी त्या गोष्टींपासून कसे भिऊ, ज्यांना तुम्ही (अल्लाहचा) सरकतदार बनविले आहे. वास्तविक तुम्ही, या गोष्टीपासून भीत नाही, की तुम्ही अल्लाहबरोबर अशा वस्तूंना शरीक ठरविले आहे, ज्यावर अल्लाहतआला ने काही पुरावा उतारला नाही. तर या दोन समूहातून शांतीचा कोण हकदार आहे[५]. जर तुम्हास ठाऊक असेल ८१

اَلَّذِيۡنَ اٰمَنُوۡا وَلَمۡ يَلۡبِسُوۡۤا اِيۡمَانَهُمۡ بِظُلۡمٍ اُولٰۤـئِكَ لَهُمُ الۡاَمۡنُ وَهُمۡ مُّهۡتَدُوۡنَ ﴿٨٢﴾

जे लोक ईमान बाळगतात; आणि आपल्या ईमानाला शिर्क बरोबर सरमिसळ करीत नाही; अशाच लोकांसाठी शांती आहे. आणि हेच सरळ मार्गावर आहेत[६] ८२

وَتِلۡكَ حُجَّتُنَاۤ اٰتَيۡنٰهَاۤ اِبۡرٰهِيۡمَ عَلٰى قَوۡمِهٖ‌ ؕ نَرۡفَعُ دَرَجٰتٍ مَّنۡ نَّشَآءُ‌ ؕ اِنَّ رَبَّكَ حَكِيۡمٌ عَلِيۡمٌ ﴿٨٣﴾

आणि हे आमचे प्रमाण होते, जे आम्ही इब्राहीमला त्याच्या लोकांच्या मुकाबल्यात दिले होते[७]. आम्ही ज्याला इच्छितो त्याला दर्जांत वाढवून देतो. नि:संशय आपला पालनकर्ता मोठा बुद्धीमान मोठा ज्ञानी आहे ८३

وَوَهَبۡنَا لَهٗۤ اِسۡحٰقَ وَيَعۡقُوۡبَ‌ ؕ كُلًّا هَدَيۡنَا‌ ۚ وَنُوۡحًا هَدَيۡنَا مِنۡ قَبۡلُ‌ وَمِنۡ ذُرِّيَّتِهٖ دَاوٗدَ وَسُلَيۡمٰنَ وَاَيُّوۡبَ وَيُوۡسُفَ وَمُوۡسٰى وَهٰرُوۡنَ‌ ؕ وَكَذٰلِكَ نَجۡزِى الۡمُحۡسِنِيۡنَ ﴿٨٤﴾

आणि आम्ही त्यांना (इब्राहीम अ.ला) इस्हाक दिला आणि याकूब[८], प्रत्येकाला आम्ही सरळ मार्ग दाखविला; आणि पूर्वीच्या काळी आम्ही नूह (अ.) ला सरळमार्ग दाखविला; आणि त्यांच्या संतती मधून[९] (सुद्धा) दाऊदला आणि सुलैमानला, आणि अय्यूबला आणि यूसुफला, आणि मूसाला आणि हारूनला आणि आम्ही याचप्रमाणे चांगली कामे करणाऱ्यांना मोबदला देत असतो ८४

وَزَكَرِيَّا وَيَحۡيٰى وَعِيۡسٰى وَاِلۡيَاسَ‌ ؕ كُلٌّ مِّنَ الصّٰلِحِيۡنَ ۙ ﴿٨٥﴾

आणि जकरियाला आणि यह्याला, आणि ईसाला[१०], आणि इलयासला (हे) सर्व सदाचरणी लोकांमधून होते ८५

وَاِسۡمٰعِيۡلَ وَالۡيَسَعَ وَيُوۡنُسَ وَلُوۡطًا‌ ؕ وَكُلًّا فَضَّلۡنَا عَلَى الۡعٰلَمِيۡنَۙ ﴿٨٦﴾

तसेच इस्माईलला आणि यसआला आणि युनूसला आणि लूतला, आणि प्रत्येकाला सकल जगाच्या लोकांवर आम्ही श्रेष्ठत्व दिले ८६

१) सूर्य अरबीत पुल्लिंगी आहे. परंतु ते नाव ज्याच्याकडे इशारा केला जाईल. अभिप्रेत म्हणजे हा उगवणारा सूर्य, माझा पालनकर्ता आहे. कारण की हा सर्वांत मोठा आहे. ज्याप्रमाणे सूर्याची उपासना करणाऱ्यांना वाटते; आणि ते याची उपासना करतात. जमिनीवरून आकाशात दिसणाऱ्या ताऱ्यांमध्ये सूर्य हा सर्वात मोठा व चमकदार आहे. आणि मानवी जीवनाच्या अस्तित्वाला याचे महत्त्व आणि योगदानाचा खुलासा करणे आवश्यक नाही. म्हणूनच जे चांगले आणि उघड दिसते त्याची उपासना करणाऱ्यांमध्ये सूर्याची उपासना सर्वसाधारण केली जाते. ह.इब्राहीम عليه السلام नी अति सुक्ष्म पद्धतीने चंद्र आणि सूर्याच्या पुजाऱ्यांना त्यांच्या उपास्यांचे निरर्थक होणे, स्पष्ट केले.

२) म्हणजे या सर्व वस्तूपासून, ज्यांना तुम्ही अल्लाहचा सरकतदार बनवत आहांत, आणि ज्यांची उपासना करतात, मी अलिप्त आहे. यासाठी की त्यांच्यात बदल होत रहातो. कधी उगवतां, कधी अस्तास जातात, जी या गोष्टीचा पुरावा आहे की ते निर्मित आहेत, त्यांचा निर्माणकर्ता कोणी दुसरा आहे. ज्याच्या आज्ञेच्या हे अंकित आहे. जेंव्हा हे स्वत: दुसऱ्याचे निर्मित आणि कोणाच्या ताब्यात आहे, तर कोणाला नफा नुकसान पोहचविण्याला कसे काय समर्थ होऊ

शकतात? प्रसिद्ध आहे की, त्यावेळचा राजा नमरूदने आपले एक स्वप्न,आणि ज्योतिषाच्या भविष्य कथनावरून नवजन्मजात बालकांना ठार करण्याचा हुकूम देऊन ठेवला होता. ह.इब्राहीम ﷺ पण त्याच दिवसात जन्माला आले. ज्यामुळे त्यांना एका गुहेत ठेवण्यात आले की, नमरूद आणि त्यांच्या हस्तकांकडून ठार होण्यापासून वाचून जावे. तेथेच गुहेत वाढले आणि ज्ञान प्राप्त झाले, आणि चंद्र आणि सूर्य पाहिले, तर हे विचार प्रकट केले. परंतु ही गुहेवाली गोष्ट बरोबर नाही. कुरआनाच्या शब्दांनी ठाऊक होते की, आपल्या लोकांशी संभाषण आणि वादविवादाच्या वेळी, ह.इब्राहीम ﷺ नी या गोष्टी केल्या आहेत. याचसाठी शेवटी लोकांना संबोधित करून, सांगितले की तुमच्या ठरविलेल्या सरकतदारांकडून मी अलिप्त आहे. आणि या वादविवादाचा उद्देश्य खोट्या उपास्यांची खरी हकीकत स्पष्ट करणे आहे.

३) तोंड किंवा चेहऱ्याचा उल्लेख यासाठी केला आहे की, चेहऱ्यामुळेच माणसाची खरी ओळख होते. आणि याच्याने अभिप्रेत व्यक्तीच होते. अर्थ असा की माझी उपासना आणि तौहिद (एकेश्वरवाद) ने अभिप्रेत अल्लाह अज व जल् आहे. जो आकाश आणि पृथ्वीचा निर्माता आहे.

४) जेव्हा लोकांनी एकेश्वरवादाचे हे उपदेशपर भाषण ऐकले, ज्यामध्ये त्यांनी स्वत:च ठरविलेल्या उपास्यांचे खंडनपण होते. तर त्यांनी पण आपली प्रमाणे देणे सुरू केले. ज्याने ठाऊक झाले की, मुश्रेकीनने सुद्धा आपल्या शिर्कसाठी काही ना काही प्रमाणे घडवून ठेवली होती. ज्याचे प्रत्यंतर आज पण होऊ शकते. जितकेपण शिर्कची श्रद्धा बाळगणारे गट आहेत; सर्वांनी आपआपल्या जनतेचे समाधान करण्यासाठी आणि त्यांना समाधानी राखण्यासाठी असे 'सहारे' शोधून ठेवले आहेत; ज्यांना ते प्रमाण समजतात. किंवा ज्यामुळे कमीत कमी धोक्याच्या जाळ्यात फसलेल्या जनतेला, जाळ्यांत फसवून ठेवता येते.

५) म्हणजे मोमिन आणि मुशरिक मधून? मोमिन जवळ तर एकेश्वरावादाची भरपूर प्रमाणे आहेत. जेव्हा की मुशरिकांजवळ अल्लाहकडून उतरलेले कोणतेच प्रमाण नाही. फक्त निरर्थक वैचारिक कल्पना किंवा उघड अर्थापासून फिरवून देण्याची धडपड. याच्याने अंदाज केला जाऊ शकतो की, अभय आणि मुक्तीचा हक्कदार कोण होईल?

६) या महावाक्यात येथे जुलूमाने अभिप्रेत शिर्क आहे. जसे की, भाषांतराने स्पष्ट होते. हदीसमध्ये येते की, जेव्हा हे (आयात) महावाक्य अवतरीत झाले, तेव्हा सहाबा ﷺ नी जुलुमाचा सर्व साधारण अर्थ, कोताई, चूक, पाप, अत्याचार वैगरे समजला, ज्याने ते चिंतीत होऊन गेलेत. आणि रसूल ﷺ च्या सेवेत हजर होऊन म्हणू लागले, ''अय्युना लम् यजलिम नफसाह'' ''आमच्यातून कोण मनुष्य असा आहे ज्याने जुलूम केला नसेल?'' आपण ﷺ नी सांगितले, ''याच्याने तो जुलूम अभिप्रेत नाही, जो तुम्ही समजत आहांत; किंबहुना याच्याने अभिप्रेत शिर्क आहे. ज्याप्रमाणे ह.लुकमान ﷺ नी आपल्या मुलाला सांगितले होते. ''इन्नश्शिर्का ल जुलूमून अजीम'' (सू. लुकमान - १३) ''खचितच शिर्क मोठा जुलूम आहे.'' (स.बुखारी तफसीर सू.अन्आम)

७) म्हणजे अल्लाहच्या एक होण्यावर असा तर्क आणि प्रमाण, ज्याचे काही उत्तर, ह.इब्राहीम ﷺ च्या लोकांना देता आले नाही.

८) म्हणजे म्हातरपणात जेव्हा ते संतती होण्या पासून निराश होऊन गेले होते, जसे की, सू. हूद आ.७२-७३ मध्ये आहे. मग पुत्राबरोबर अशा नातवाचीपण खुषखबर दिली, जो याकूब होईल. ज्याच्या अर्थात हा विषय समाविष्ट आहे की, याच्यानंतर त्यांच्या संततीचा क्रम चालेल.

९) जुर्रीयतिही मध्ये 'जमीर' चा 'मरजा' काही भाष्यकारांनी ह. नूह ﷺ ला ठरविले आहे. कारण की तेच सर्वांत जवळचे आहेत. म्हणजे नूह ﷺ संततीमधून दाऊद ﷺ आणि सुलैमान ﷺ ला आणि काहींनी ह.इब्राहीम ﷺ ला यासाठी की, हे सर्व बोलणे त्यांच्याशीच संबंधित होत आहे. परंतु या स्वरूपात मग ही शंका येते की, मग लूत ﷺ चा उल्लेख या यादीत यावयास नको होता. कारण की, ते इब्राहीम ﷺ च्या संततीमधून नाहीत. ते यांचे भाऊ हारान बिन आजरचे पुत्र म्हणजे ह.इब्राहीम ﷺ चे पुतणे आहेत. आणि ह.इब्राहीम ﷺ ,ह.लूत ﷺ चे वडील नाहीत, काका आहेत. परंतु केवळ एकत्र म्हणण्यासाठी त्यांना सुद्धा इब्राहीम ﷺ च्या संततीत धरण्यात आले आहे. याचे आणखी एक उदाहरण कुरआन मजीदमध्ये आहे. जेथे ह.इस्माईल ﷺ ला याकूब ﷺ च्या संततीचे पितामह म्हणून धरले आहे, जेव्हा की हे त्यांचे काका होते. (पहा.सू.बकर: आ.१३३)

१०) ईसा ﷺ चे वर्णन ह.नूह ﷺ किंवा ह.इब्राहीम ﷺ च्या संततीत यासाठी करण्यात आले आहे की, (वास्तविक त्यांना वडील नव्हते) मुलगीची संतती सुद्धा, पुरूषांच्या वंशातच गणती केली जाते. ज्याप्रमाणे नबी ﷺ नी, ह. हसन ﷺ (आपली मुलगी ह.फातमा ﷺ चे सुपुत्र) ला आपला मुलगा म्हटले, ''नि:संशय माझा हा मुलगा सरदार आहे. आणि आशा आहे की, अल्लाहतआला याच्यामार्फत मुसलमानांचे दोन मोठ्या समूहामध्ये सामंजस्य घडवून आणेल.

وَمِنْ اٰبَآىِٕهِمْ وَذُرِّيّٰتِهِمْ وَاِخْوَانِهِمْ ۚ وَاجْتَبَيْنٰهُمْ وَهَدَيْنٰهُمْ اِلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿٨٧﴾

**आणि तसेच यांच्या वाडवडिलांतून काहींना, आणि काही संततीला आणि काही भाऊबंदांना[१], आणि आम्ही त्यांना निवडून घेतले आणि आम्ही त्यांना सरळ मार्गाची सुबुद्धी दिली ﴿८७﴾**

ذٰلِكَ هُدَى اللّٰهِ يَهْدِيْ بِهٖ مَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ ۭ وَلَوْ اَشْرَكُوْا لَحَبِطَ عَنْهُمْ مَّا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿٨٨﴾

**अल्लाहची हिदायत तीच आहे, ज्याच्या मार्फत आपल्या सेवकातून ज्याला इच्छितो, त्याला हिदायत देतो; आणि जर या लोकांनी पण शिर्क केले असते, तर जी काही कर्मे ते करीत होते; सर्व अक्रित[२] झाले असते ﴿८८﴾**

اُولٰٓىِٕكَ الَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ وَالْحُكْمَ وَالنُّبُوَّةَ ۚ فَاِنْ يَّكْفُرْ بِهَا هٰٓؤُلَاۗءِ فَقَدْ وَكَّلْنَا بِهَا قَوْمًا لَّيْسُوْا بِهَا بِكٰفِرِيْنَ ﴿٨٩﴾

**हे असे होते की, ज्यांना आम्ही पुस्तक व ज्ञान व पैगंबरी दिली होती. तर, जर हे लोक (तुमच्या) पैगंबरीला नाकारतील[३]; तर आम्ही त्यासाठी असे पुष्कळसे लोक निश्चित करून ठेवले आहेत, जे याचे (म्हणजे तुमच्या पैगंबरीला) नाकारणारे नाहीत[४] ﴿८९﴾**

اُولٰٓىِٕكَ الَّذِيْنَ هَدَى اللّٰهُ فَبِهُدٰىهُمُ اقْتَدِهْ ۭ قُلْ لَّآ اَسْـَٔلُكُمْ عَلَيْهِ اَجْرًا ۭ اِنْ هُوَ اِلَّا ذِكْرٰى لِلْعٰلَمِيْنَ ﴿٩٠﴾

**ही माणसे अशी होती, ज्यांना अल्लाहतआलाने सरळमार्ग दाखविला होता. म्हणून आपण सुद्धा त्यांच्याच मार्गावर चाला[५]. आपण सांगून टाका की मी तुमच्याकडून काही मोबदला मागीत नाही[६]; हा तर फक्त सकल जगाच्या लोकांसाठी एक उपदेश आहे[७] ﴿९०﴾**

وَمَا قَدَرُوا اللّٰهَ حَقَّ قَدْرِهٖٓ اِذْ قَالُوْا مَآ اَنْزَلَ اللّٰهُ عَلٰي بَشَرٍ مِّنْ شَيْءٍ ۭ قُلْ مَنْ اَنْزَلَ الْكِتٰبَ الَّذِيْ جَاۗءَ بِهٖ مُوْسٰي نُوْرًا وَّهُدًى لِّلنَّاسِ تَجْعَلُوْنَهٗ قَرَاطِيْسَ تُبْدُوْنَهَا وَتُخْفُوْنَ كَثِيْرًا ۚ وَعُلِّمْتُمْ مَّا لَمْ تَعْلَمُوْٓا اَنْتُمْ وَلَآ اٰبَاۗؤُكُمْ ۭ قُلِ اللّٰهُ ۙ ثُمَّ ذَرْهُمْ فِيْ خَوْضِهِمْ يَلْعَبُوْنَ ﴿٩١﴾

**आणि या लोकांनी अल्लाहची जशी कदर ओळखणे आवश्यक होते, तशी कदर ओळखली नाही; उलट असे सांगितले की, अल्लाहतआलाने कोण्या मनुष्यावर कुठलीही गोष्ट अवतरीत केली नाही[८]. आपण असे सांगा की, ते पुस्तक कोणी अवतरीत केले आहे, ज्याला मूसा (अ) घेऊन आले होते. ज्याची वस्तुस्थिती अशी आहे की, ते प्रकाश आहे. आणि लोकांसाठी ती हिदायत आहे. ज्याला तुम्ही या वेगवेगळ्या पृष्ठांमध्ये राखून ठेवले आहे[९]; ज्यांना जाहीर करतात, आणि पुष्पळशा गोष्टींना लपवितात; आणि तुम्हांस बऱ्याच अशा गोष्टी दाखविण्यांत आल्या आहेत, ज्यांना तुम्ही जाणत नव्हता, तसेच न तुमचे मोठे लोक[१०] (जाणत नव्हते) आपण सांगून टाका की (हे पुस्तक) अल्लाह्ने अवतरीत केले आहे.[११] मग त्यांना त्यांच्या निरर्थक उहापोहांत खेळ बनविण्यात राहू द्या ﴿९१﴾**

وَهٰذَا كِتٰبٌ اَنْزَلْنٰهُ مُبٰرَكٌ مُّصَدِّقُ الَّذِيْ بَيْنَ يَدَيْهِ وَلِتُنْذِرَ اُمَّ الْقُرٰى وَمَنْ حَوْلَهَا ۭ وَالَّذِيْنَ يُؤْمِنُوْنَ بِالْاٰخِرَةِ يُؤْمِنُوْنَ بِهٖ وَهُمْ عَلٰي صَلَاتِهِمْ يُحَافِظُوْنَ ﴿٩٢﴾

**आणि हे असे पुस्तक आहे, ज्याला आम्ही अवतरीत केले आहे. जे मोठे बरकतवाले आहे. आपल्यापूर्वीच्या पुस्तकांना सत्य ठरवणारे आहे. आणि यासाठी की, तुम्ही (सल्ल.) मक्कावाल्यांना आणि त्याच्या जवळपासच्या (लोकांना) भिववावे. आणि जे लोक परलोकाचा विश्वास बाळगतात, असे लोक यावर ईमान आणतात आणि ते आपल्या नमाजीची पण कळकळ बाळगतात ﴿९२﴾**

१) म्हणजे त्यांच्या भाऊबंधांमधून सुद्धा पुष्कळांना आम्ही पैगंबरीपद आणि हिदायत दिली. 'इजतेबा' चा अर्थ आहे निवडून घेणे, आणि आपल्या खास सेवकांत गणती करणे; आणि त्यांच्याबरोबर संमलित करणे मग 'इजतेबाअ' चा अर्थ होईल, आपल्या खास सेवकांत मिळवून घेणे.

२) अठरा पैगंबरांची नावे वर्णन करून, अल्लाहतआला फर्मावीत आहे, जर हे लोकपण शिर्कचा अंगिकार करून घेते; तर त्यांची सारी कर्मे अक्रीत झाली असती. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी नबी ﷺ ला संबोधित करून, अल्लाहतआलाने फर्माविले, ''हे पैगंबरा! जर तू पण शिर्क केलेस, तर तुझी सर्व कर्मे बर्बाद होऊन जातील.'' (सू. जुमर - ६५)

वास्तविक पाहता पैगंबराकडून शिर्क होणे शक्य नाही. उद्देश लोक समूहांना शिर्कच्या भयानक आणि गारद करण्यापासून सावध करणे आहे.
३) याच्याने अभिप्रेत रसूल ﷺ चे विरोधक मुश्‌रिकीन आणि काफिर आहेत.
४) याच्याने अभिप्रेत मुहाजिरीन, व अन्सार आणि कयामतपर्यंत येणारे ईमानदार आहेत.
५) याच्याने अभिप्रेत उल्लेखित पैगंबर आहेत. त्यांच्या अनुकरणाची आज्ञा एकेश्वरवादाच्या समस्येत आणि त्यांच्या आदेश आणि शास्त्रांत आहे, जे रद्द झालेले नाहीत. (फत्हुल कद्दीर) कारण की, धर्माची तत्वे सर्व धर्म शास्त्रांमध्ये एकच राहिली आहेत. जरी धर्मशास्त्रांमध्ये व पद्धती मध्ये काही काही मतभेद राहिला. जसे की आयत ''शरअलकुम मिनद्दिनी मा वस्सा बिही नुहन्'' (सू. शूरा-१३) ने स्पष्ट आहे.
६) म्हणजे प्रचार आणि आवाहनाचा कारण, की मला याचा मोबदला पुरेसा आहे. जो परलोकात अल्लाहकडून मिळेल.
७) सकल जगाच्या लोकांनी यापासून उपदेश ग्रहण करावा. बस हे कुरआन त्यांना कुफ्र आणि शिर्कच्या अंध:कारापासून काढून हिदायतचा प्रकाश देईल. आणि मार्ग भ्रष्टतेच्या पायवाटातून काढून ईमानच्या सरळ मार्गाला लाऊन देईल. या अटीवर, की कोणी याचा उपदेश प्राप्त करू इच्छेल.
८) कदरचा अर्थ अंदाज करण्याचा आहे. आणि हे कोण्या गोष्टीचे सत्य जाणणे आणि त्याची ओळख करून घेण्याच्या अर्थात, उपयोगात आणले जाते. अर्थ असा की, हे मक्केचे मुशरिकीन, पैगंबर पाठवण्याचा आणि पुस्तक अवतरीत होण्याला नाकारत आहे; ज्याचा स्पष्ट अर्थ असा आहे की, त्यांना अल्लाहची खरी ओळखच झालेली नाही; नाहीतर त्यांनी या गोष्टींना नाकारले नसते. याशिवाय अल्लाहच्या याच ओळखीच्या उणिवेमुळे ते पैगंबरीची ओळख करून घेण्याला पण असमर्थ आहेत, आणि असे समजत राहिले की, कोण्या मनुष्यावर अल्लाहची वाणी कशाप्रकारे अवतरीत होऊ शकते? ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी अल्लाहने सांगितले, ''काय ही गोष्ट लोकांच्या आश्चर्याला कारणीभूत आहे, की आम्ही त्यांच्यातूनच, एका माणसावर 'वह्य' अवतरीत करून, त्याला लोकांना भिवविण्यासाठी तैनात करून दिले आहे ?'' (सू. युनूस - २) दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''हिदायत येऊन गेल्यानंतर लोक याला मान्य करण्याला, यासाठी थांबले आहेत की, त्यांनी म्हटले की काय अल्लाहतआलाने एका माणसाला पैगंबर बनवून पाठवून दिले आहे?'' (सू. बनी इस्राईल - १४) याचा काही तपशील, याच्यापूर्वी आ.क्र.८ च्या समासांत पण येऊन चुकला आहे. खुलाशासाठी असलेल्या महावाक्यात सुद्धा, त्यांनी याच विचारांच्या आधारावर या गोष्टीचे खंडन केले की, अल्लाहतआलाने कोण्या मनुष्यावर कोणी पुस्तक अवतरीत केले आहे. अल्लाहतआलाने म्हटले जर अशी गोष्ट असेल, तर त्यांना विचारा ह.मूसा عليه السلام वर तौरात कोणी अवतीर्ण केले होते? (ज्याला हे पण मानतात.)
९) महावाक्याच्या वरील भाष्याप्रमाणे आता यहूद्यांना संबोधित करून सांगण्यात येत आहे की, तुम्ही या पुस्तकाला वेगवेगळ्या पानांत ठेवतात; ज्यातून ज्याला इच्छितात त्याला जाहीर करून टाकतात; आणि ज्याला इच्छिता त्याला लपवून टाकता. जशी धोंडमाराची समस्या किंवा नबी ﷺ च्या लक्षणांची गोष्ट आहे. हाफीज इब्ने कसीर आणि इमाम इब्ने जरीर तबरी वगैरेनी 'यजअलुनहू' आणि 'युबदूनहा' सेगा गायबच्या सोबतीवाल्या किराअतला, प्राधान्य दिले आहे; आणि प्रमाण हे दिले आहे की, हे महावाक्य मक्की आहे; याच्यांत यहूद्यांना कसे काय संबोधित केले जाईल? आणि काही भाष्यकारांनी संपूर्ण; महावाक्यालाच यहूद्यांशी संबंधित ठरविले आहे. आणि याच्यांत पैगंबरीला जे नाकारणे आहे; त्याला यहूद्यांचा दुराग्रह अडेलतट्टूपणा आणि अहंकारावर आधारित म्हणणे ठरविले आहे. जणू या महावाक्याच्या भाष्यांत भाष्यकारांची तीन मते आहेत. एक संपूर्ण महावाक्याला यहूद्यांशी, दुसरे संपूर्ण महावाक्याला, बहुदेववाद्यांशी संबंधित, आणि तिसरे महावाक्याचा सुरवातीचा भाग, मुशरिकीनशी संबंधित आणि 'तजअलूनहू' पासून यहूद्यांशी संबंधित ठरवतात. वल्लाह आलम्
१०) यहूदशी संबंधित मानण्याचे स्वरूपात याचे भाष्य! होईल की, तौरातच्या मार्फत तुम्हास दाखविण्यात आली; दुसऱ्या प्रकारांत कुरआनाच्या मार्फत.
११) हे 'मन् अन्जल' (कोणी उतारले?) चे उत्तर आहे.

وَمَنْ أَظْلَمُ مِمَّنِ افْتَرَىٰ عَلَى اللَّهِ كَذِبًا أَوْ قَالَ أُوحِيَ
إِلَيَّ وَلَمْ يُوحَ إِلَيْهِ شَيْءٌ وَمَن قَالَ سَأُنزِلُ مِثْلَ مَا أَنزَلَ
اللَّهُ ۗ وَلَوْ تَرَىٰ إِذِ الظَّالِمُونَ فِي غَمَرَاتِ الْمَوْتِ
وَالْمَلَائِكَةُ بَاسِطُو أَيْدِيهِمْ أَخْرِجُوا أَنفُسَكُمُ ۖ الْيَوْمَ
تُجْزَوْنَ عَذَابَ الْهُونِ بِمَا كُنتُمْ تَقُولُونَ عَلَى اللَّهِ
غَيْرَ الْحَقِّ وَكُنتُمْ عَنْ آيَاتِهِ تَسْتَكْبِرُونَ ﴿٩٣﴾

**आणि त्या मनुष्यापेक्षा कोण आणखी जास्त जालीम असेल, जो अल्लाहतआलावर खोटा आळ घेईन, किंवा असे म्हणेन की, माझ्यावर ‘वह्य’ येते. वास्तविक त्याच्याजवळ कुठल्याही गोष्टीची पण ‘वह्य’ येत नाही. आणि जो मनुष्य असे म्हणेन की, जशी वाणी अल्लाहने अवतरीत केली आहे; अशाप्रकारची मी पण आणतो. आणि जर आपण त्या वेळी पाहाल, जेव्हा की हे जालीम लोक, मृत्यूच्या कठीण अवस्थेत असतील; आणि देवदूत आपले हात पुढे करून, म्हणत असतील की चला आपले प्राण काढा. आज तुम्हाला फजितीची शिक्षा दिली जाईल. या[१] कारणाने की, तुम्ही अल्लाहतआलावर खोट्या गोष्टी थोपत होता, आणि त्याच्या महावाक्यापासून अहंकार करीत होता[२] ९३**

وَلَقَدْ جِئْتُمُونَا فُرَادَىٰ كَمَا خَلَقْنَاكُمْ أَوَّلَ مَرَّةٍ
وَتَرَكْتُم مَّا خَوَّلْنَاكُمْ وَرَاءَ ظُهُورِكُمْ ۖ وَمَا نَرَىٰ
مَعَكُمْ شُفَعَاءَكُمُ الَّذِينَ زَعَمْتُمْ أَنَّهُمْ فِيكُمْ شُرَكَاءُ ۚ
لَقَد تَّقَطَّعَ بَيْنَكُمْ وَضَلَّ عَنكُم مَّا كُنتُمْ تَزْعُمُونَ ﴿٩٤﴾

**आणि तुम्हीआमच्या जवळ एकटे एकटे येऊन गेलात[३]; ज्याप्रमाणे आम्ही तुम्हाला पहिल्या वेळी निर्माण केले होते. आणि जे काही आम्ही तुम्हास दिले होते, त्याला आपल्या मागेच सोडून आले. आणि आम्ही तर तुमच्या बरोबर त्या शिफारस करणाऱ्यांना पाहत नाही. ज्यांच्या संबंधात तुम्ही दावा करीत होता की, ते तुमच्या मामल्यात भागीदार आहेत. खरोखर तुमच्या आपसात तर संबंध विच्छेद होऊन गेला. आणि तो तुमचा दावा झाला गेलेसा होऊन गेला ९४**

१) जालिम ने अभिप्रेत प्रत्येक जालिम आहे. आणि याच्यात अल्लाहच्या पुस्तकाला नाकारणारे आणि खोट्या धर्माच्या पैगंबरीचा दावा करणारे, सर्व प्रथम शामील आहेत. ‘गमरात’ ने मृत्यूची कठीण अवस्था अभिप्रेत आहे. ‘‘देवदूत हात पुढे करीत असतील.’’ म्हणजे प्राण हरण करण्यासाठी ‘अल्यौमा’ (आज) ने अभिप्रेत प्राण हरण करण्याचा दिवस आहे. आणि हाच शिक्षेच्या सुरू होण्याचा पण वेळ आहे. ज्याची सुरू होण्याची जागा कबर आहे. आणि याच्याने सिद्ध होते की, कबरचा अजाब, सत्य आहे. नाही तर हात पसरणे आणि प्राण हरण करण्याचा हुकूम देण्याबरोबर या गोष्टीच्या म्हणण्याला काही अर्थ नाही की, आज तुम्हाला फजितीची शिक्षा दिली जाईल. लक्षात असू द्यावे की कबरने अभिप्रेत बर्जखचे जीवन आहे. म्हणजे ऐहिक जीवनानंतर आणि परलोकाच्या जीवनापूर्वी, हे एक मध्यंतराचे जीवन आहे. ज्याचा काळ माणसाच्या मृत्यूपासून कयामत येईपर्यंतचा आहे. हे बर्जखी जीवन म्हणविले जाते. मग भलेही त्याला कोणी श्वापदाने खाऊन टाकले असेल, त्याचे प्रेत समुद्राच्या लाटांत नाहिसे झालेले असो, किंवा त्याला जाळून राख करून टाकले गेले असेल किंवा कबरीत दफन करून दिले गेले असेल, हे बर्जखचे जीवन आहे, ज्यांत शिक्षा करण्याला अल्लाहतआला समर्थ आहे.

२) अल्लाहकडे खोट्या गोष्टी लावण्यामध्ये, पुस्तकाचे अवतरण आणि पैगंबराच्या पाठविण्याचा इनकार करणे पण आहेत. आणि पैगंबरीचा खोटा दावा करणेपण आहे. अशाचप्रकारे पैगंबरीला नाकारणे, आणि अल्लाहच्या महावाक्यांना नाकारणे आणि अहंकार करणेपण आहे. या दोन्ही कारणांनी त्यांना अप्रतिष्ठेची आणि फजितीची शिक्षा दिली जाईल.

३) ‘फुरादा’ ‘फरद’ हे अनेकवचन आहे, ज्याप्रमाणे सुकारा सकरानचे व कुसाला, कुसलाचे अनेकवचन आहे. अर्थ हा आहे की, तुम्ही वेगवेगळे, एक एक करून, माझ्याजवळ याल. तुमच्याजवळ संपत्ती असणार नाही, आणि संतती असणार नाही. तसेच ते उपास्यपण असणार नाही, ज्यांना तुम्ही अल्लाहचे सरकतदार आणि आपले मददगार समजत होता. म्हणजे यांच्यातून कोठलीही वस्तू, तुम्हास फायदा पोहचविण्यास समर्थ असणार नाही.पुढील महावाक्यांमध्ये याच गोष्टीचा आणखी खुलासा आहे.

إِنَّ اللَّهَ فَالِقُ الْحَبِّ وَالنَّوَىٰ ۖ يُخْرِجُ الْحَيَّ مِنَ الْمَيِّتِ وَمُخْرِجُ الْمَيِّتِ مِنَ الْحَيِّ ۚ ذَٰلِكُمُ اللَّهُ ۖ فَأَنَّىٰ تُؤْفَكُونَ ﴿٩٥﴾

**नि:संशय अल्लाहतआला दाण्याला आणि आठळीला फाडणारा आहे[१]; तो सजीवाला निर्जिवांतून काढतो[२]. आणि तो निर्जीवाला सजीवातून काढणारा आहे[३]. हाच तर अल्लाहतआला होय, मग तुम्ही कोठे भटकत चालले जात आहांत ९५**

فَالِقُ الْإِصْبَاحِ وَجَعَلَ اللَّيْلَ سَكَنًا وَالشَّمْسَ وَالْقَمَرَ حُسْبَانًا ۚ ذَٰلِكَ تَقْدِيرُ الْعَزِيزِ الْعَلِيمِ ﴿٩٦﴾

**तो सकाळचा काढणारा आहे[४]. आणि त्याने रात्रीला विश्रांतीसाठी बनविले[५], आणि सूर्य आणि चंद्राला कालमानासाठी ठेवले आहे[६]. ही ठरविलेली गोष्ट आहे अशा व्यक्तीत्वाची (म्हणजे अल्लाहची) जो सर्व समर्थ आणि ज्ञानी आहे ९६**

وَهُوَ الَّذِي جَعَلَ لَكُمُ النُّجُومَ لِتَهْتَدُوا بِهَا فِي ظُلُمَاتِ الْبَرِّ وَالْبَحْرِ ۗ قَدْ فَصَّلْنَا الْآيَاتِ لِقَوْمٍ يَعْلَمُونَ ﴿٩٧﴾

**आणि तो असा आहे, ज्याने तुमच्यासाठी ताऱ्यांना निर्माण केले. कारण की तुम्ही त्यांच्या मार्फत अंधारात, जमिनीवर आणि समुद्रांत पण मार्ग शोधू शकाल[७]. नि:संशय आम्ही प्रमाणे फार स्पष्ट स्पष्ट करून सांगितली आहेत; त्या लोकांकरता जे ज्ञान बाळगतात ९७**

१) येथून अल्लाहतआलाचे ज्याला कुठलीही उपमा देता येणार नाही, असे सामर्थ्य आणि कौशल्याचे वर्णन सुरू होत आहे. सांगितले, अल्लाहतआला दाणे (हब्ब) आणि आठळ्यां(नांवात अनेकवचन नवा) ना, ज्यांना शेतकरी, जमिनीच्या आंत दाबून टाकतो, त्यांना फाडून, त्यांच्यापासून निरनिराळ्या प्रकारचे वृक्ष आणि वनस्पती उगवतो. जमीन एकच असते, पाणी पण, ज्याच्याने शेतीला पाजले जाते, एकच असते. परंतु ज्या ज्या वस्तूंचे ते दाणे किंवा आठळ्या असतात, याच्याप्रमाणे अल्लाहतआला, वेगवेगळ्या प्रकारचे धान्य आणि फळांचे वृक्ष त्यांच्यापासून निर्माण करून देतो. काय अल्लाहतआलाशिवाय आणखी कोणी आहे, जो हे काम करेल किंवा करू शकेल?

२) म्हणजे दाणे आणि आठळ्यापासून वृक्ष उगवून टाकतो; ज्याच्यांत जीवन असते, आणि जो वाढतो पसरतो, आणि फळे किंवा धान्य देतो. किंवा ते सुवासिक रंगबेरंगी फुले असतात; ज्यांना पाहून आणि वास घेऊन, मनुष्य आनंदीत आणि प्रफुल्लीत होतो किंवा विर्याच्या थेंबापासून आणि अंड्यापासून माणसे आणि जनावरे निर्माण करतो.

३) म्हणजे प्राण्यापासून अंडे जे निर्जीव समजले जातात, जिवंत आणि मृताची उपमा मोमिन आणि काफिरलापण दिली गेली आहे; म्हणजे मोमिनच्या घरात काफिर आणि काफिरच्या घरांत मोमीन निर्माण करतो.

४) अंधकार आणि प्रकाशाचा निर्माणकर्तापण तोच आहे. तो रात्रीच्या अंध:कारापासून प्रकाशित उष:काल निर्माण करतो; ज्याने प्रत्येक गोष्ट प्रकाशित होऊन जाते.

५) म्हणजे रात्रीला अं:धकारांत बदलून देतो. कारण की लोकांनी प्रकाशातील सर्व व्यस्तता सोडून विश्रांती घेऊ शकावी.

६) म्हणजे दोहोंसाठी एक गणना निश्चित आहे; ज्यांच्यात काही बदल आणि गडबड आणि गोंधळ होत नाही. परंतु दोहोंचे आपआपले मार्ग आहेत, ज्यावर ते हिवाळ्यांत आणि उन्हाळ्यात मार्गक्रमणाकरीत राहतात. ज्याच्या आधारावर हिवाळ्यात दिवस लहान आणि रात्र मोठ्या आणि उन्हाळ्यात याच्या उलट दिवस मोठे आणि रात्री लहान होऊन जातात. ज्याचा तपशिल सू.यूनुस – ५, सू.यासीन – ४० आणि सू.आअराफ – ५४ मध्ये सुद्धा वर्णन केला गेला आहे.

७०) ताऱ्यांचा येथे हा एक फायदा आणि उद्देश वर्णन केला गेला आहे. यांचे आणखी दोन उद्देश आहेत. जे दुसऱ्या ठिकाणी वर्णन केले आहेत. आकाशाची शोभा आणि शैतानांना मारपीट, 'रजुमल् लिश्शयातीन' म्हणजे शैतान आकाशावर जाण्याचा प्रयत्न करतात. तर हे त्यांच्यावर आगीचा लोळ बनून पडतात. काही धर्मश्रेष्ठींचे म्हणणे आहे, ''या तीन गोष्टी शिवाय, या ताऱ्यांच्या बाबतीत, जर कोणी मनुष्य, आणखी काही श्रद्धा बाळगत असेल, तर तो चुकीवर आहे. आणि अल्लाहवर खोटा आळ घेत आहे.'' याने ठाऊक झाले की, आमच्या देशात भविष्य शास्त्राच्या ज्ञानाची जी चर्चा आहे, ज्यात ग्रहांच्या (ताऱ्यांच्या) मार्फत, भविष्यातील परिस्थिती आणि मानवी जीवन, आणि विश्वांत त्यांचे परिणाम होण्याचा दावा केला जातो; तो निराधार आहे; आणि धर्म शास्त्रांच्या विरूद्धपण आहे. म्हणून एका हदीसमध्ये याला जादूचाच एक भाग दाखविण्यात आला आहे. (अबुदाऊद)

وَهُوَ الَّذِيْٓ اَنْشَاَكُمْ مِّنْ نَّفْسٍ وَّاحِدَةٍ فَمُسْتَقَرٌّ
وَّمُسْتَوْدَعٌ ؕ قَدْ فَصَّلْنَا الْاٰيٰتِ لِقَوْمٍ يَّفْقَهُوْنَ ۝٩٨

आणि तो असा आहे, ज्याने तुम्हाला एका माणसापासून निर्माण केले. मग एक जागा जास्त राहण्यासाठी आहे, आणि एक जागा थोडा काळ राहण्याची(१). नि:संशय आम्ही प्रमाणे फार स्पष्ट स्पष्ट करून सांगितली आहेत; त्या लोकांसाठी जे समझबुझ बाळगतात (९८)

وَهُوَ الَّذِيْٓ اَنْزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً ۚ فَاَخْرَجْنَا بِهٖ نَبَاتَ
كُلِّ شَيْءٍ فَاَخْرَجْنَا مِنْهُ خَضِرًا نُّخْرِجُ مِنْهُ حَبًّا
مُّتَرَاكِبًا ۚ وَمِنَ النَّخْلِ مِنْ طَلْعِهَا قِنْوَانٌ دَانِيَةٌ وَّجَنّٰتٍ
مِّنْ اَعْنَابٍ وَّالزَّيْتُوْنَ وَالرُّمَّانَ مُشْتَبِهًا وَّغَيْرَ
مُتَشَابِهٍ ؕ اُنْظُرُوْٓا اِلٰى ثَمَرِهٖٓ اِذَآ اَثْمَرَ وَيَنْعِهٖ ؕ اِنَّ فِيْ
ذٰلِكُمْ لَاٰيٰتٍ لِّقَوْمٍ يُّؤْمِنُوْنَ ۝٩٩

आणि तो असा आहे ज्याने, आकाशातून पाऊस पाडला; मग आम्ही त्याच्याने प्रत्येक प्रकारच्या वनस्पती उगविल्या(२). मग आम्ही त्यातून हिरवी ताटे काढली(३). त्यातून आम्ही वर खाली गुफलेले दाणे निपजवितो(४) आणि खजुरीच्या वृक्षातून म्हणजे त्यांच्या गाभ्यातून गुच्छ आहेत, जे खालच्या बाजुस लटकलेले असतात(५). आणि द्राक्षांच्या बागा आणि जैतून(६) आणि डाळींब की काही एक दुसऱ्याशी मिळती जुळती असतात. आणि काही एक दुसऱ्याशी मिळती जुळती नसतात(७). प्रत्येकांच्या फळांना पहा, जेव्हा ते लागते आणि त्याच्या पिकव्याला पहा यात प्रमाणे आहेत(८), त्या लोकांसाठी जे ईमान बाळगतात (९९)

وَجَعَلُوْا لِلّٰهِ شُرَكَآءَ الْجِنَّ وَخَلَقَهُمْ وَخَرَقُوْا لَهٗ ع ١٢ ١٨
بَنِيْنَ وَبَنٰتٍۭ بِغَيْرِ عِلْمٍ ؕ سُبْحٰنَهٗ وَتَعٰلٰى عَمَّا يَصِفُوْنَ ۝١٠٠

आणि लोकांनी शैतानांना अल्लाहतआलाचा सरकतदार ठरवून ठेवले आहे, वास्तविक त्या लोकांना अल्लाहनेच निर्माण केले आहे. आणि त्या लोकांनी अल्लाहसाठी मुले आणि मुली कुठल्याही सनदीशिवाय, बनवून ठेवल्या आहेत; तो पवित्र आणि थोर आहे, त्या गोष्टीपासून जे
१२ रु १८ हे करतात (१००)

بَدِيْعُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ اَنّٰى يَكُوْنُ لَهٗ وَلَدٌ وَّلَمْ تَكُنْ
لَّهٗ صَاحِبَةٌ ؕ وَخَلَقَ كُلَّ شَيْءٍ ۚ وَهُوَ بِكُلِّ شَيْءٍ
عَلِيْمٌ ۝١٠١

तो आकाशांचा आणि पृथ्वीचा निर्माता आहे. अल्लाहतआलाची संतती कशी असूंशकेल? वास्तविक त्याची तर कोणी पत्नी नाही ; आणि अल्लाहतआलाने प्रत्येक गोष्टीला निर्माण(९) केले आणि तो प्रत्येक वस्तूला फार चांगल्याप्रकारे जाणतो (१०१)

ذٰلِكُمُ اللّٰهُ رَبُّكُمْ ۚ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۚ خَالِقُ كُلِّ شَيْءٍ
فَاعْبُدُوْهُ ۚ وَهُوَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ وَّكِيْلٌ ۝١٠٢

हा आहे अल्लाहतआला तुमचा पालनकर्ता! त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. प्रत्येक गोष्टीचा निर्माण कर्ता, तर तुम्ही त्याची उपासना करा. आणि तो हरेक वस्तूचा नियंता आहे (१०२)

لَا تُدْرِكُهُ الْاَبْصَارُ ؗ وَهُوَ يُدْرِكُ الْاَبْصَارَ ۚ وَهُوَ اللَّطِيْفُ
الْخَبِيْرُ ۝١٠٣

त्याला तर कोणाची दृष्टी जाणू शकत नाही(१०); आणि तो सर्वांच्या दृष्टीस जाणतो. आणि तो सुक्ष्मदर्शी बहुश्रुत आहे (१०३)

قَدْ جَآءَكُمْ بَصَآئِرُ مِنْ رَّبِّكُمْ ۚ فَمَنْ اَبْصَرَ فَلِنَفْسِهٖ ۚ
وَمَنْ عَمِيَ فَعَلَيْهَا ؕ وَمَآ اَنَا عَلَيْكُمْ بِحَفِيْظٍ ۝١٠٤

आता कुठल्याही शंकेशिवाय तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याजवळ स्पष्टप्रमाणे येऊन चुकली आहेत;म्हणून जो मनुष्य पाहून घेईल, तो आपला (च) फायदा करील. आणि जो मनुष्य आंधळा होऊन राहील, तो आपले (च) नुकसान करेल(११). आणि मी तुमचा रखवालदार नाही(१२) (१०४)

१) बहुतेक भाष्यकारांजवळ 'मुसतकर्र' ने आईचे गर्भाशय आणि 'मुसतव्दअ्' ने बापाचा पाठीचा कणा अभिप्रेत आहे. (फत्हुल कदीर, इब्ने कसीर)

२) येथून त्याच्या एका विचित्र कारागिरीचे वर्णन होत आहे. म्हणजे पावसाचे पाणी ज्याच्याने तो हरेक प्रकारच्या वनस्पती निर्माण करतो.

३) याच्याने अभिप्रेत हिरव्या फांद्या आणि कोंब आहेत. जे जमिनीत दबलेल्या दाण्यापासून, अल्लाहतआला जमिनीच्यावर जाहीर करतो. मग ते झुडूप किंवा वृक्ष घनदाट हिरवेगार होते.

४) म्हणजे या हिरव्यागार फांद्यातून आम्ही वर खाली भरलेले दाणे काढतो. ज्याप्रमाणे गहू आणि तादुळाच्या ओंब्या

असतात. अभिप्रेत हे सर्व धान्य वर्गातील आहे. उदा. जव, ज्वारी, बाजरी, मका, गहू आणि तादूळ वगैरे.

५) 'किनवानुन' 'किनवून' चे अनेकवचन आहे. जसे 'सिनवुन' 'सिनवान' आहे. अभिप्रेत घड किंवा गुच्छे आहेत. 'तलअून' तो गाभा आहे, जी खजुरीची सुरवातीची अवस्था आहे. हाच वाढून घड किंवा गुच्छ बनतो. आणि मग तो ओल्या रसदार खजुरीचे रूप धारण करीतो. 'दानियतून' ने अभिप्रेत ते गुच्छे आहेत, जे जवळ असतील आणि काही गुच्छे दुरपण असतात, ज्यांच्यापर्यंत हात पोहचत नाही. एक उपकार म्हणून 'दानियातून' चा उल्लेख करून दिला आहे.

६) 'जन्नात' जैतुन आणि डाळींब हे सर्व 'मनसुब'आहे, ज्याचा 'अतफ' 'नबात' वर आहे. म्हणजे पावसाच्या पाण्याने आम्ही द्राक्षांच्या बागा, आणि जैतून आणि डाळींब निर्माण केले.

७) म्हणजे काही वैशिष्टांमध्ये हे एक दुसऱ्याशी मिळते जुळते आहेत. आणि काही मध्ये मिळते जुळते नाहीत. किंवा त्यांची पाने एक दुसऱ्याशी मिळणारी आहेत. फळांत साम्य नाही. किंवा स्वरूपात एक दुसऱ्याशी मिळणारी आहेत. परंतु त्याची चव एक दुसऱ्याशी भिन्न केले.

८) म्हणजे चर्चित सर्व वस्तूमध्ये, ही विश्व निर्माणकर्त्याचे अद्धितीय सामर्थ्य आणि त्याची बुद्धीमत्ता आणि दयेची प्रमाणे आहेत.

९) म्हणजे ज्याप्रमाणे अल्लाहतआला या सर्व वस्तूंच्या निर्माण करण्यांत (एकुलता) एक आहे, कोणी त्याचा सरकतदार नाही. याचप्रमाणे तो या योग्यतेचा आहे की, त्याची एकट्याची उपासना केली जावी. उपासनेमध्ये आणखी कोणाला शामील न केले जावे. परंतु लोकांनी या एका व्यक्तीत्वाला सोडून जिन्नांना त्याचा सरकतदार बनवून ठेवले आहे. वास्तविक ते स्वत: अल्लाहचे निर्माण केलेले आहेत. मुशरिकीन उपासना तर मूर्तींची किंवा कबरीत पुरण्यात आलेल्या व्यक्तींची करतात. परंतु येथे सांगण्यात आले आहे की, त्यांनी जिन्नांतांना अल्लाहचा सरकतदार बनविले आहे. गोष्ट वास्तविक अशी आहे की, जिन्नातने अभिप्रेत शैतान आहेत; आणि शैतानांच्या सांगण्यानेच शिर्क केले जाते. म्हणून जणूंशैतानांचीच उपासना केली जाते. या विषयाला कुरआन करीममध्ये अनेक ठिकाणी वर्णन करण्यांत आले उदा. सू. निसा-११७, सू.मर्यम - ४४, सू. यासीन - ६० सू.सबा-४१

१०) 'अबसार' बसर (दृष्टी) चे अनेकवचन आहे. म्हणजे माणसाचे डोळे, अल्लाहच्या हकीकतीच्या अंतापर्यंत पोहचू शकत नाही. आणि जर याच्याने अभिप्रेत मनुष्याची दृष्टी असेल, तर याचा संबंध दुनियेशी राहील; म्हणजे जगाच्या डोळ्यांनी कोणी अल्लाहला पाहू शकत नाही. तथापि हे खऱ्या आणि क्रमबद्ध रिवायतींनी सिद्ध आहे की, कयामतच्या दिवशी ईमानवाले अल्लाहला पाहतील. आणि स्वर्गांत सुद्धा त्याच्या दर्शनाने लाभान्वीत होतील. म्हणून 'मुअतजला' च्या या महावाक्याने आधार घेत, हे म्हणणे आहे की, अल्लाहतआलाला कोणी पाहू शकत नाही. या जगात नाही की परलोकांत नाही. हे बरोबर नाही; कारण की, या नकाराचा संबंध फक्त या दुनियेशी आहे. म्हणून ह.आयेशा ﵂ पण या आयतचा आधार घेत म्हणत असत, ज्या मनुष्याने पण हा दावा केला की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी (मेअराजच्या रात्री) अल्लाहतआलाचे दर्शन केले आहे; त्याने निव्वळ खोटे बोलले आहे. (स.बुखारी तफसीर सू.अन्आम) कारण की, या आयतीनुसार पैगंबरांसह कोणीपण, अल्लाहला पाहण्यास समर्थ नाही. तथापि परलोकाच्या जीवनात हे दर्शन शक्य होईल. जसे दुसऱ्या ठिकाणी कुरआनाने याला मान्य केले. ''कित्येक चेहरे त्या दिवशी, प्रफुल्लित आणि टवटवीत असतील, आपल्या पालनकर्त्याकडे पाहत असतील.'' (सू. अल् कियामा - २१,२२)

११) 'बसाईर' 'बसीरत् चे अनेकवचन आहे. जे खरे पाहता, अंत:करणाच्या प्रकाशाचे नांव आहे. येथे अभिप्रेत ती प्रमाणे आणि निशाण्या आहेत, जी कुरआनांत जागो जागी आणि वारंवार वर्णन केली गेली आहेत. आणि ज्यांना नबी ﷺ नी पण हदीसमध्ये सांगितले आहे. जो या प्रमाणांना पाहून हिदायतचा मार्ग अनुसरेल, त्यांत त्याचाच फायदा आहे. आणि जर अनुसरणार नाही, तर त्याचेच नुकसान आहे. जसे सांगितले, ''जो सरळमार्ग पत्करेल, तो स्वत: आपल्याच भल्यासाठी सरळमार्ग अनुसरतो, आणि जो भटकून जाईल, त्याचे ओझे त्याच्यावरच आहे.'' (सू. बनी इस्राईल - १५) याचा अर्थ पण तोच आहे, जो स्पष्टीकरणाखाली असलेल्या महावाक्याचा आहे.

१२) परंतु फक्त प्रचारक, आवाहक आणि खुषखबरी देणारा आणि भिवविणारा आहे. मार्ग दाखविणे माझे काम आहे. मार्गावर चालवून देणे, हे अल्लाहच्या आधिन आहे.

وَكَذٰلِكَ نُصَرِّفُ الْاٰيٰتِ وَلِيَقُوْلُوْا دَرَسْتَ وَلِنُبَيِّنَهٗ لِقَوْمٍ يَّعْلَمُوْنَ ﴿١٠٥﴾

आणि आम्ही अशाप्रकारे प्रमाणांना निरनिराळ्या बाजूंनी वर्णन करीतो; यासाठी की त्यांनी म्हणावे की, आपण हे कोणापासून शिकून घेतले आहे?[१] आणि यासाठी की जे लोक समज राखतात, त्याच्या करीता खूप स्पष्ट करून सांगावे (१०५)

اِتَّبِعْ مَآ اُوْحِيَ اِلَيْكَ مِنْ رَّبِّكَ ۚ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۚ وَاَعْرِضْ عَنِ الْمُشْرِكِيْنَ ﴿١٠٦﴾

आपण स्वत: या मार्गावर चालत रहा, ज्याचे 'वह्य' आपल्या पालनकर्त्याकडून आपणाकडे, आले आहे. अल्लाह शिवाय कोणी उपासनेच्या योग्य नाही. आणि बहुदेववाद्यांकडे लक्ष देऊ नका .(१०६)

وَلَوْ شَآءَ اللّٰهُ مَآ اَشْرَكُوْا ؕ وَمَا جَعَلْنٰكَ عَلَيْهِمْ حَفِيْظًا ۚ وَمَآ اَنْتَ عَلَيْهِمْ بِوَكِيْلٍ ﴿١٠٧﴾

आणि जर अल्लाहतआलाला मंजूर असते तर, हे शिर्क न करते आणि[२] आम्ही आपणास त्यांचा रखवालदार बनविले नाही. आणि आपण त्यांच्यावर रक्षकपण नाही[३] (१०७)

وَلَا تَسُبُّوا الَّذِيْنَ يَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ فَيَسُبُّوا اللّٰهَ عَدْوًاۢ بِغَيْرِ عِلْمٍ ؕ كَذٰلِكَ زَيَّنَّا لِكُلِّ اُمَّةٍ عَمَلَهُمْ ص ثُمَّ اِلٰى رَبِّهِمْ مَّرْجِعُهُمْ فَيُنَبِّئُهُمْ بِمَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿١٠٨﴾

आणि अपशब्द बोलू नका. त्यांना, ज्यांची हे लोक, अल्लाहतआलाला सोडून उपासना करीतात; कारण की मग ते अज्ञानामुळे मर्यादा सोडून अल्लाहतआलास हकनाक अपशब्द बोलतील.[४] आम्ही अशाचप्रकारे प्रत्येक पद्धतीवाल्यांना त्यांची कर्मे सुशोभित करून दाखविली आहेत. नंतर आपल्या पालनकर्त्याकडे, त्यांना जाणे आहे; तेव्हा तो त्यांना दाखवून देईल, जे काही ते करत असत (१०८)

وَاَقْسَمُوْا بِاللّٰهِ جَهْدَ اَيْمَانِهِمْ لَئِنْ جَآءَتْهُمْ اٰيَةٌ لَّيُؤْمِنُنَّ بِهَا ؕ قُلْ اِنَّمَا الْاٰيٰتُ عِنْدَ اللّٰهِ وَمَا يُشْعِرُكُمْ ۙ اَنَّهَآ اِذَا جَآءَتْ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿١٠٩﴾

आणि या लोकांनी शपथांवर मोठा जोर देऊन[५], अल्लाहतआलाची शपथ घेतली की, जर त्यांच्याजवळ कोणी निशाणी येऊन जाईल[६]. तर ते अवश्य तिच्यावर ईमान आणतील; आपण सांगून टाका निशाण्या सर्व अल्लाहच्या कबज्यात आहेत[७]. आणि तुम्हास त्याची काय खबर की त्या निशाण्या ज्यावेळी येऊन जातील; हे लोक तेव्हाही ईमान आणणार नाही (१०९)

وَنُقَلِّبُ اَفْئِدَتَهُمْ وَاَبْصَارَهُمْ كَمَا لَمْ يُؤْمِنُوْا بِهٖٓ اَوَّلَ مَرَّةٍ وَّنَذَرُهُمْ فِيْ طُغْيَانِهِمْ يَعْمَهُوْنَ ﴿١١٠﴾ ع

١٣ ع ١٠ ١٩

१३ १० १९
आणि आम्ही सुद्धा त्यांच्या अंत:करणांना आणि दृष्टीला फिरवून टाकू; जसे की, या लोकांनी यावर पहिल्यावेळी ईमान आणले नाही; आणि[८] आम्ही त्यांना त्यांच्या शिरजोरीत भटकत राहू देऊ[९] (११०)

१) म्हणजे आम्ही एकेश्वरवाद आणि त्याच्या प्रमाणांना अशा प्रकारे स्पष्ट स्पष्ट करून आणि वेगवेगळ्या पद्धतीने वर्णन करीत आहोत; की मुशरिकीन असे म्हणू लागतात की, मुहम्मद ﷺ कुठून तरी वाचून आणि शिकून आला आहे. ज्या प्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''काफिरांनी सांगितले की हे कुरआन तर त्याने स्वत: रचलेले आहे. ज्यासाठी दुसऱ्यांनी पण त्याची मदत केली आहे. या लोकांनी असा दावा करून जुलूम आणि खोटे बोलण्यावर येऊन ठेपले आहे. तसेच त्यांनी म्हटले की या पहिल्या लोकांच्या गोष्टी आहेत; ज्याला याने लिहून ठेवल्या आहेत...... '' (सू. फुरकान-४,५) वास्तविक गोष्ट अशी नाही, ज्याप्रमाणे हे समजतात किंवा दावा करतात. किंबहुना या तपशिलाचा उद्देश समजदार लोकांना चांगल्याप्रकारे समजाऊन सांगणे हा आहे. कारण की त्यांच्यावर तर्क पुरा होऊन जावा.

२) या मुद्द्याचे स्पष्टीकरण पूर्वी ही करून झाले आहे; की अल्लाहची मर्जी वेगळी गोष्ट आहे आणि त्याची प्रसन्नता वेगळी आहे. त्याची प्रसन्नता तर यातच आहे. की त्याच्याबरोबर 'शिर्क' न केले जावे. तथापि त्याने यावर मानवांना भाग पाडले नाही कारण की बळजबरीच्या स्वरूपांत मनुष्याची कसोटी घेता आली नसती. नाहीतर अल्लाहतआलाजवळ असे अधिकार आहेत की, जर तो इच्छिल तर कोणी मनुष्य शिर्क करण्याला समर्थच होऊ शकणार नाही. (आणखी पहावे सू.बकर: आ. २५३ आणि सू.अन्‌आम आ. ३५ चा समास)

३) हा विषय पण कुरआन मजीदमध्ये अनेक ठिकाणी वर्णन करण्यात आला आहे. उद्देश नबी ﷺ ची आमंत्रक आणि

प्रचारकाची भूमिका विशद करणे आहे. जी पैगंबरीपदाला आवश्यक आहे. आणि आपण ﷺ फक्त याच मर्यादेपर्यंत जबाबदार होते. याच्यापेक्षा जास्त जर आपल्याजवळ अधिकार असते तर आपण ﷺ नी आपले उपकार करणारे काका अबु तालिबला जरूर मुसलमान करून घेतले असते. ज्यांनी इस्लाम कबूल करून घ्यावा अशी आपली तिव्र इच्छा होती.

४) जर एक योग्य काम त्यापेक्षा पण जास्त मोठ्या वाईटाला कारणीभूत होत असेल, तर तेव्हा त्या योग्य कामाला न करणे फार उत्तम आहे. याप्रमाणे नबी ﷺ नी पण फर्माविले आहे की, ''तुम्ही कोणाच्या आईबापाला शिवी देऊ नका. की अशाप्रकारे तुम्ही स्वत: आपल्या आईवडीलांना शिवी देण्याला कारणीभूत होऊन जाल.'' (स.मुस्लीम) यात अल्लातआलाच्या एका कायदयाचे वर्णन आहे. जे त्याच्या निर्मित मखलूकमध्ये लागू आहे की जेव्हा मनुष्य एखादया कार्याला पसंत करतो आणि त्यात छंद ठेवतो तर हे प्रेम आणि छंद त्या कार्याला त्याच्या नजरेत सुशोभित करून टाकतात. तथापि जरी ते वाईट असो. मुशरिकीनचा (बहुदेववादयांचा) आपल्या खोट्या उपास्याचा बचाव याच गोष्टीशी आहे. म्हणून त्यांना मुसलमानांची ती तनकीद चांगली वाटत नसे, जी ते त्यांच्या खोट्या उपास्यांवर करत असत. आणि त्यांनी ही धमकी दिली की जर मुसलमान आमच्या उपास्यांच्या विरोधात काही बोलतील तर आम्हीही त्यांच्या उपास्याला (अल्लाहला) अपशब्द वापरण्यास मागेपुढे पाहणार नाही. (अयसरूत्तफासीर) आजपण भटकलेल्या मुसलमानांना मृत्यू पावलेल्या विषयी म्हटले जाते की, ते ईश्वरी अधिकारांच्या पात्रतेचे नाहीत. त्यांना स्टष्टीत परिवर्तन करण्याचा आणि नफा तोटा पोहोचविण्याचा अधिकार नाही. ते कुणाचीही याचना ऐकण्यास समर्थ नाहीत. म्हणून ते कुणाचीही मदत करू शकत नाही. याचप्रमाणे बिदआत (ते नवे काम जे दीनच्या नावाने केले जावे आणि ज्याचा उल्लेख हदीस किंवा कुरआनात न असो.) च्या विषची म्हटले जाते की हे फार मोठे पाप आहे. बिदआतला सर्वात घृणास्पद काम म्हटले गेले आहे. तर फक्त नावापुरते मुसलमान लोकांना हया गोष्टी अतिशय वाईट वाटतात. आणि त्यांना बिदआत करणे चांगले वाटते. याउलट या गोष्टींना ते वाडवडिलांचा अपमान समजतात. खरे तर या गोष्टींमध्ये कोणताही अपमान जाणवत नाही. हे तर एकेश्वरवादाचे प्रचार व सुन्नत आहे. परंतु ज्यांच्यामस्तिष्कात शिर्क भरलेला आहे, हा एकेश्वरवादाचा बिंदू कशाप्रकारे त्यांच्या डोक्यात येईल. तथापि ते याच्या उत्तरात उम्मत मोठया धर्मपंडितांना वाईट बोलणे सुरु करून देतात.

५) मोठ्या ताकीदीने शपथा घेतल्या.

६) म्हणजे कोणी मोठा चमत्कार जो यांच्या इच्छेप्रमाणे असेल, जशी मूसा عليه السلام ची काठी मृताला जिवंत करणे आणि समूद ची उंटीण वगैरे सारखा.

७) म्हणजे याची ही मागणी नैसर्गिक कायद्याच्या विरूद्ध छिद्रान्वेषण आणि अहंकार म्हणून आहे. हिदायत मिळावी अशा इरादाने नाही. तथापि अशा निशाण्यांचे जाहीर करणे, संपूर्णपणे अल्लाहच्या अधिकारांत आहे. तो इच्छील तर यांची मागणी पूर्ण करून देईल. काही मुर्सल रिवायतीत आहे की, मक्केच्या काफिरांनी मागणी केली होती की, सफा डोंगर सोन्याचा बनवून दिला जावा. तर ते ईमान आणतील. ज्यावर जिब्रईल عليه السلام नी येऊन सांगितले, जर याच्यानंतर पण ते ईमान आणणार नाही, तर त्यांना नष्ट करून टाकले जाईल. ज्याला नबी ﷺ नी, पसंत केले नाही. (इब्ने कसीर)

८) याचा अर्थ आहे की, जेव्हा पहिल्या वेळी ईमान आणले नाही. तर त्यामुळे अल्लाहचा प्रकोप त्यांच्यावर असा पडला की, पुढील काळांत पण, त्यांची ईमान आणण्याची शक्यता संपून गेली. अंत:करणांना आणि नजरेला फिरवून देण्याचा हाच अर्थ आहे. (इब्ने कसीर) आणि त्यांची ही मोजेजा दाखविण्याची मागणी वैरासाठी होती, हिदायत प्राप्त करण्यासाठी नव्हती. त्यांचा खरा उद्देश रसूल ﷺ ना तंग करणे आणि अल्लातआच्या महावाक्याशी चेष्टा करणे होता.

९) म्हणजे त्यांना त्यांचे शिर्क आणि अन्यायात हैरान व भटकण्यासाठी सोडून देऊ. ते सत्याला असत्याने व हिदायतला भटकण्याने ओळखू शकणार नाही.

**आणि जर आम्ही त्यांच्याजवळ देवदूतांना पाठवून दिले असते[१]; आणि त्यांच्याशी मृत (व्यक्ती) बोलू लागले असते; आणि[२] आम्ही त्या सर्व वस्तू (ज्या अल्लाहने निर्माण केल्या आहेत) त्यांचेजवळ त्यांच्या डोळ्यांसमक्ष आणून जमा करून दिले असते[३]; तेव्हा सुद्धा हे लोक अजिबात ईमान न आणते; हां! पण जर अल्लाहच इच्छील तर वेगळी गोष्ट आहे. परंतु यांच्यातून बहुतेक लोक अडाणीपणाच्या गोष्टी करतात[४] ११११**

وَلَوْ اَنَّنَا نَزَّلْنَآ اِلَيْهِمُ الْمَلٰٓئِكَةَ وَكَلَّمَهُمُ الْمَوْتٰى وَحَشَرْنَا عَلَيْهِمْ كُلَّ شَيْءٍ قُبُلًا مَّا كَانُوْا لِيُؤْمِنُوْٓا اِلَّآ اَنْ يَّشَآءَ اللّٰهُ وَلٰكِنَّ اَكْثَرَهُمْ يَجْهَلُوْنَ ﴿١١١﴾

**आणि अशाचप्रकारे आम्ही, प्रत्येक पैगंबराचे शत्रू पुष्कळसे शैतान निर्माण केले होते; काही मनुष्ये आणि काही जिन्न[५] ज्यांच्यातून काही काहींना तिखटमिठ लावलेल्या गोष्टी भरवीत असत. कारण की त्यांना फसवणूकीत टाकून द्यावे[६]. आणि जर अल्लाहतआला इच्छिता, तर हे अशी कामे करू शकले नसते[७]. तर त्या लोकांना आणि त्यांच्या खोटया कुभांडास आपण राहू द्या ११२**

وَكَذٰلِكَ جَعَلْنَا لِكُلِّ نَبِيٍّ عَدُوًّا شَيٰطِيْنَ الْاِنْسِ وَالْجِنِّ يُوْحِيْ بَعْضُهُمْ اِلٰى بَعْضٍ زُخْرُفَ الْقَوْلِ غُرُوْرًا ۭ وَلَوْ شَآءَ رَبُّكَ مَا فَعَلُوْهُ فَذَرْهُمْ وَمَا يَفْتَرُوْنَ ﴿١١٢﴾

**आणि यासाठी की, जे लोक परलोकावर विश्वास ठेवीत नाहीत त्यांची मने आकर्षिली जावीत आणि यासाठी की त्याला पसंत करावे हे जे कमवू इच्छितात, ते कमवावे.[८] ११३**

وَلِتَصْغٰٓى اِلَيْهِ اَفْـِٕدَةُ الَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ بِالْاٰخِرَةِ وَلِيَرْضَوْهُ وَلِيَقْتَرِفُوْا مَا هُمْ مُّقْتَرِفُوْنَ ﴿١١٣﴾

१) जसे की ते वारंवार याची मागणी आमच्या पैगंबराकडे करीत आहे.

२) आणि ते हजरत मुहम्मद ﷺच्या पैगंबरीला मान्य करून घेते.

३) याचा दुसरा भावार्थ हा वर्णन केला गेला आहे, की ज्या निशाण्या ते मागतात, ते सर्व त्यांच्यासमोर सादर करून दिल्या असत्या; आणि एक भावार्थ हा पण वर्णन करण्यात आला आहे, की प्रत्येक वस्तू जमा होऊन गटा गटाने ही साक्ष देतील, की पैगंबराचा येण्याचा क्रम सत्य आहे, तर या सर्व निशाण्या आणि मागण्यांना पूर्ण करून दिल्यावर सुद्धा हे ईमान आणणार नाही, परंतु ज्याला अल्लाह इच्छील. या भावार्थाची ही महावाक्ये सुद्धाआहे, ''ज्यांच्यावर तुझ्या पालनकर्त्याची गोष्ट सिद्ध होऊन गेली आहे, ते ईमान आणणार नाहीत; जरी त्यांचेजवळ प्रत्येक प्रकारची निशाणी येऊन जाईल. येथ पावेतो की ते, वेढनादायक शिक्षा पाहून घेतील.'' (सू. यूनुस - ९६-९७)

४) आणि या अडाणीपणाच्या गोष्टीच, त्यांच्यात आणि सत्य कबूल करण्याच्या दरम्यान अडथळा निर्माण करणाऱ्या आहेत. जर आडाणीपणाचा पर्दा उचलला जाईल, तर कदाचित् सत्य त्यांच्या लक्षांत येईल आणि मग अल्लाहच्या मर्जीने सत्त्याचा अंगिकारपण करून घेतील.

५) ही तीच गोष्ट आहे, जी वेगवेगळ्या प्रकारांनी, रसूल ﷺच्या सांत्वनासाठी सांगण्यात आली आहे की, आपल्यापूर्वी जेवढेही पैगंबर होऊन चुकले; त्यांना खोटे ठरविण्यात आले, त्यांना ईजा देण्यात आल्या, वगैरे वगैरे. उद्देश हा आहे की, ज्याप्रमाणे त्यांनी धैर्याने आणि हिंमतीने काम केले, आपण सुद्धा या सत्याच्या शत्रूंच्या मुकाबल्यात सहनशिलता आणि दृढजमून जाण्याला करून दाखववे. याने हे पण ठाऊक झाले की, शैतानाचे अनुयायी जिन्नातांमधून सुद्धा आहेत आणि मानवांमधून सुद्धा आहेत. आणि हे ते आहेत की दोन्ही गटातून शिरजोर, बंडखोर आणि गर्विष्ठ प्रकारचे आहेत.

६) 'वह्य,' गुप्त गोष्टीला म्हणतात. म्हणजे मानवांना आणि जिन्नांना मार्गभ्रष्ट करण्यासाठी एक दुसऱ्याला लबाड्या आणि धोका देणे शिकवतात, की ज्यामुळे लोकांना धोका आणि फसवणुकीत टाकता येऊ शकावे. ही गोष्ट सर्व साधारणपणे अनुभवासपण आली आहे की, शैतानी कामात, लोक एक दुसऱ्याबरोबर खूप मदत करत असतात. ज्यामुळे वाईट गोष्टी फार लवकर उर्जीतावस्थेला जातात.

७) म्हणजे अल्लाहतआला तर त्या शैतानी हाताच्या चलाखीला, अयशस्वी करण्यावर समर्थ आहे. परंतु तो बळजबरीने असे करणार नाही. कारण असे करणे त्याच्या व्यवस्थेच्या आणि तत्त्वाच्या विरूद्ध आहे. जे त्याने आपल्या मर्जीनुसार अंगिकारले आहे. ज्याची प्रयोजने तो चांगल्या प्रकारे जाणतो.

८) म्हणजे शैतानी विचारांचे बळी तेच लोक होतात, आणि तेच त्याला पसंत करतात, आणि त्याच्याप्रमाणे काम करतात, जे परलोकावर विश्वास ठेवत नाहीत. आणि हे वास्तव आहे की, ज्या हिशेबाने लोकांत परलोकाच्या श्रद्धेच्या बाबतीत क्षिणता येत आहे, त्याच हिशेबाने लोक शैतानी जाळ्यात फसत आहेत.

اَفَغَيْرَ اللّٰهِ اَبْتَغِيْ حَكَمًا وَّهُوَ الَّذِيْٓ اَنْزَلَ اِلَيْكُمُ الْكِتٰبَ مُفَصَّلًا ؕ وَالَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ يَعْلَمُوْنَ اَنَّهٗ مُنَزَّلٌ مِّنْ رَّبِّكَ بِالْحَقِّ فَلَا تَكُوْنَنَّ مِنَ الْمُمْتَرِيْنَ ﴿١١٤﴾

**तर काय! अल्लाहशिवाय आणखी कोणी निर्णय करणारा शोधावे? वास्तविक तो असा आहे की त्याने एक परिपूर्ण पुस्तक तुमच्याजवळ पाठवून दिले आहे. याचे विषय फार स्पष्ट स्पष्ट वर्णन केले गेले आहेत. आणि ज्या लोकांना आम्ही पुस्तक दिले आहे; ते या गोष्टीला खात्रीपूर्वक जाणतात की, हे आपल्या पालनकर्त्याकडून सत्यासह पाठविले गेले आहे; म्हणून आपण शंका घेणाऱ्यांमधून न होऊन जावे[१] (११४)**

وَتَمَّتْ كَلِمَتُ رَبِّكَ صِدْقًا وَّعَدْلًا ؕ لَا مُبَدِّلَ لِكَلِمٰتِهٖ ۚ وَهُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿١١٥﴾

**आणि तुमच्या पालनकर्त्याची वाणी सत्त्याच्या आणि न्यायाच्या दृष्टीने परिपूर्ण आहे[२]. आणि त्याच्या वाणीला कोणी बदलणारा नाही[३]. आणि तो खूप ऐकतो आणि सर्व काही जाणतो[४]. (११५)**

وَاِنْ تُطِعْ اَكْثَرَ مَنْ فِى الْاَرْضِ يُضِلُّوْكَ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ ؕ اِنْ يَّتَّبِعُوْنَ اِلَّا الظَّنَّ وَاِنْ هُمْ اِلَّا يَخْرُصُوْنَ ﴿١١٦﴾

**आणि जगात पुष्कळशे लोक असे आहेत, की जर आपण त्यांचे म्हणणे मानून घ्याल,तर ते तुम्हास अल्लाहच्या मार्गावरून मार्गभ्रष्ट करून टाकतील ते तर केवळ काल्पनिक विचारावर चालतात; आणि निव्वळ तर्क वितर्क करतात[५] (११६)**

१) आपल्याला संबोधून खरे म्हणजे उम्मतला शिक्षण देण्यात येत आहे.

२) माहिती आणि घटनांच्या दृष्टीने खरा आहे. आणि आदेश व समस्यांच्या अनुषंगाने न्यायप्रिय आहे. म्हणजे त्याचा प्रत्येक आदेश आणि मनाई, न्यायावर आधारित आहे. कारण की त्याने त्याच गोष्टीचा हुकूम दिला आहे. ज्यात मानवाचा फायदा आहे आणि त्याच गोष्टीपासून मना केले आहे, ज्याच्यात नुकसान आणि फसाद आहे. जणू मनुष्य आपल्या नादानीने किंवा शैतानाने फूस दिल्याने या वास्तवाला न समजू शकेल.

३) म्हणजे कोणी असा नाही जो अल्लाहच्या कोण्या हुकूमामध्ये बदल करून टाकेल कारण की त्याच्याहून मोठा कोणी शक्तीमान नाही.

४) म्हणजे सेवकांचे म्हणणे ऐकून घेणारा आणि त्यांची एक एक कृती आणि चाल ठाऊक असणारा आहे; आणि याच्याप्रमाणे प्रत्येकाला बदला देईल.

५) कुरआनाने वर्णन केलेल्या या हकीकतीचा पण घटना म्हणून प्रत्येक काळात अनुभव घेतला जाऊ शकतो. दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''आपली इच्छा असून सुद्धा बहुतेक लोक ईमान आणणार नाहीत.'' (सू. यूसुफ-१०३) याच्याने ठाऊक झाले की, सत्य आणि खऱ्या मार्गावर चालणारे लोक, नेहमी अल्पच असतात. ज्याच्याने ही गोष्टपण सिद्ध झाली की, सत्य आणि असत्याची कसोटी, प्रमाणे आणि निशाण्या आहेत. लोकांची बहुतायता किंवा अल्पता नाही. म्हणजे असे नाही की ज्या गोष्टीला बहुतायतेने अंगिकारले असेल; ते सत्य झाले, आणि अल्पतेत रहाणारे मिथ्यावर आहेत. परंतु चर्चित कुरआनाच्या हकीकतीनुसार हे जास्त शक्य आहे की, सत्त्यावर असलेले संख्येच्या दृष्टीने अल्पसंख्य असावेत, आणि असत्यवाले बहुसंख्य. ज्याचे समर्थन त्या हदीसने पण होते, जिच्यात नबी ﷺ नी फर्माविले, आहे की, ''माझी उम्मत ७३ पंथात विभागली जाईल; ज्यातून फक्त एक पंथ स्वर्गात जाणारा असेल; बाकी सर्व नरकाग्नीत जाणारे; आणि स्वर्गात जाणाऱ्या पंथाची निशाणी आपण ﷺ नी ही सांगितली की, जो ''माझ्या आणि सहाबांच्या तरीक्यावर चालणारा असेल.'' (अबु दाऊद तिरमिज़ी) अंधानुकरण करणारे पंथ आपल्या बहुतायतच्या जोरावर आपल्याला सत्त्यावर आणि अहले हदीसला, जे ''मा अना अलैहि व असहाबी'' ला मान्य करणारे आहेत, निरर्थक (असत्त्यावर) समजतात. वास्तविक अंधानुकरण (तकलीद) सहाबांच्या मार्गाच्या विरुद्ध आहे. आणि या अंधानुकरणाने, ते खऱ्या अर्थाने रसूल ﷺ च्या आज्ञापालनाच्या दौलतीपासून पण वंचित आहेत. कारण कित्येक हदीसींना ते तर्क करणारे (सोडून देणारे) आहेत. जेव्हा अशी गोष्ट आहे, तर मग ते केवळ बहुसंख्येच्या जोरावर, सत्त्यावर कसे काय असू शकतात? याचप्रमाणे आजकाल लोकशाहीची मोठी चर्चा आहे. कुरआनाच्या वर्णन केलेल्या या तत्त्वाचे लोकशाहीचे पण खंडन होऊन जाते. यासाठी की, 'लोकशाही' बहुसंख्यावालेचे मत आणि त्याच्या इच्छेचे नाव आहे. आणि बहुतायत मार्गभ्रष्ट झालेल्यांची आहे; म्हणून यांच्या मागे चालणारे मार्गभ्रष्टच होऊ शकता, हिदायत (मार्गदर्शन) मिळवणारे नाही.

إِنَّ رَبَّكَ هُوَ أَعْلَمُ مَن يَضِلُّ عَن سَبِيلِهِۦ ۖ وَهُوَ أَعْلَمُ بِالْمُهْتَدِينَ ﴿١١٧﴾

निश्चितच आपला पालनकर्ता त्यांना खूप जाणतो, जो त्याच्या मार्गाहून मार्गभ्रष्ट होऊन जातो. आणि तो त्यांना पण खूप चांगल्याप्रकारे जाणतो, जे त्याच्या मार्गावर चालतात (११७)

فَكُلُوا۟ مِمَّا ذُكِرَ ٱسْمُ ٱللَّهِ عَلَيْهِ إِن كُنتُم بِـَٔايَـٰتِهِۦ مُؤْمِنِينَ ﴿١١٨﴾

तर ज्या जनावरांवर अल्लाहचे नाव घेतले जाईल, त्यातून खा. जर तुम्ही त्याच्या हुकूमावर ईमान ठेवता[१] (११८)

وَمَا لَكُمْ أَلَّا تَأْكُلُوا۟ مِمَّا ذُكِرَ ٱسْمُ ٱللَّهِ عَلَيْهِ وَقَدْ فَصَّلَ لَكُم مَّا حَرَّمَ عَلَيْكُمْ إِلَّا مَا ٱضْطُرِرْتُمْ إِلَيْهِ ۗ وَإِنَّ كَثِيرًا لَّيُضِلُّونَ بِأَهْوَآئِهِم بِغَيْرِ عِلْمٍ ۗ إِنَّ رَبَّكَ هُوَ أَعْلَمُ بِٱلْمُعْتَدِينَ ﴿١١٩﴾

आणि तुम्हास कोणते कारण याचे सबब होऊ शकते की तुम्ही अशा जनावरांमधून खाऊ नये; ज्यावर अल्लाहचे नाव घेतले गेले असेल; वास्तविक अल्लाहतआलाने त्या सर्व जनावरांचा तपशील दाखवून दिला आहे, ज्यांना तुमच्यावर हराम केले आहे[२]. परंतु तरी सुद्धा जेव्हा तुम्हास फारच आवश्यकता पडून जाईल, तर हलाल आहे. आणि ही निश्चित गोष्ट आहे की, पुष्कळशी माणसे, आपल्या चुकीच्या विचारांवर कुठल्याही सनदी शिवाय मार्गभ्रष्ट करतात. यांच्यात काही शंका नाही की, अल्लाहतआला मर्यादेबाहेर निघून जाणाऱ्यांना खूप जाणतो (११९)

وَذَرُوا۟ ظَـٰهِرَ ٱلْإِثْمِ وَبَاطِنَهُۥٓ ۚ إِنَّ ٱلَّذِينَ يَكْسِبُونَ ٱلْإِثْمَ سَيُجْزَوْنَ بِمَا كَانُوا۟ يَقْتَرِفُونَ ﴿١٢٠﴾

आणि तुम्ही उघड पापालापण सोडून द्या, आणि गुप्त पापालापण सोडून द्या. निःसंशय जे लोक पाप करीत आहेत, त्यांना त्यासाठी लवकरच शिक्षा मिळेल (१२०)

وَلَا تَأْكُلُوا۟ مِمَّا لَمْ يُذْكَرِ ٱسْمُ ٱللَّهِ عَلَيْهِ وَإِنَّهُۥ لَفِسْقٌ ۗ وَإِنَّ ٱلشَّيَـٰطِينَ لَيُوحُونَ إِلَىٰٓ أَوْلِيَآئِهِمْ لِيُجَـٰدِلُوكُمْ ۖ وَإِنْ أَطَعْتُمُوهُمْ إِنَّكُمْ لَمُشْرِكُونَ ﴿١٢١﴾

आणि अशा जनावरांतून खाऊ नका, ज्यांच्यावर अल्लाहचे नाव घेतले गेले नसेल. आणि हे काम आज्ञाभंग करणारे आहे[३]; आणि खचितच् शैतान आपल्या मित्रांना हे शिकवत आहेत की तुमच्याशी वितंडवाद करावा[४]. आणि जर तुम्ही त्या लोकांचा कहा मानला तर खचितच् तुम्ही मुशरिक होऊन जाल (१२१)

ع १४ ११ १

أَوَمَن كَانَ مَيْتًا فَأَحْيَيْنَـٰهُ وَجَعَلْنَا لَهُۥ نُورًا يَمْشِى بِهِۦ فِى ٱلنَّاسِ كَمَن مَّثَلُهُۥ فِى ٱلظُّلُمَـٰتِ لَيْسَ بِخَارِجٍ مِّنْهَا ۚ كَذَٰلِكَ زُيِّنَ لِلْكَـٰفِرِينَ مَا كَانُوا۟ يَعْمَلُونَ ﴿١٢٢﴾

असा मनुष्य जो पहिले मृत होता, मग आम्ही त्यास जिवंत करून दिले; आणि आम्ही त्यास एक असा प्रकाश देऊन दिला की तो त्याला घेऊन, माणसांत चालत फिरत आहे,काय असा माणूस त्या माणसासारखा होऊ शकतो; जो अंध:कारातून निघूच शकत नाही[५]. अशाप्रकारे काफिरांना त्यांची कर्मे सुशोभित वाटतात (१२२)

وَكَذَٰلِكَ جَعَلْنَا فِى كُلِّ قَرْيَةٍ أَكَـٰبِرَ مُجْرِمِيهَا لِيَمْكُرُوا۟ فِيهَا ۖ وَمَا يَمْكُرُونَ إِلَّا بِأَنفُسِهِمْ وَمَا يَشْعُرُونَ ﴿١٢٣﴾

आणि अशा प्रकारे आम्ही प्रत्येक वस्तीमध्ये तेथल्या श्रीमंतांनाच अपराध करणारे बनविले, कारण की त्या लोकांनी तेथे खोडसळपणा करावा[६]. आणि ते लोक आपल्याच बरोबर खोडसळपणा करीत आहे; आणि त्यांना जरा पण ठाऊक पडत नाही[७] (१२३)

وَإِذَا جَآءَتْهُمْ ءَايَةٌ قَالُوا۟ لَن نُّؤْمِنَ حَتَّىٰ نُؤْتَىٰ مِثْلَ مَآ أُوتِىَ رُسُلُ ٱللَّهِ ۘ ٱللَّهُ أَعْلَمُ حَيْثُ يَجْعَلُ رِسَالَتَهُۥ ۗ سَيُصِيبُ ٱلَّذِينَ أَجْرَمُوا۟ صَغَارٌ عِندَ ٱللَّهِ وَعَذَابٌ شَدِيدٌۢ بِمَا كَانُوا۟ يَمْكُرُونَ ﴿١٢٤﴾

आणि जेव्हा त्यांच्याजवळ कोणी महावाक्य पोहचते तर असे म्हणतात की, आम्ही कधीच ईमान आणणार नाही, जोपर्यंत आम्हास पण अशी गोष्ट न दिली जाईल, जी अल्लाहच्या पैगंबरांना दिली जाते[८]. या स्थळाला तर, अल्लाहच खूप जाणतो की त्याने आपली पैगंबरी कोणाला द्यावी[९]. लवकरच त्या लोकांना ज्यांनी अपराध केला आहे, अल्लाहजवळ पोहचवून फजीती मिळेल, आणि त्यांच्या खोडसाळपणाबद्दल कडक शिक्षा मिळतील (१२४)

१) म्हणजे ज्या जनावरावर शिकार करतेवेळी किंवा जबह किंवा नहर करताना, अल्लाहचे नाव घेतले असेल, त्याला खाऊन घ्या. या अटीवर की, ते त्या जनावरांमधून असावे, ज्याचे खाणे हलाल असेल. याचा अर्थ असा झाला की, ज्या जनावरांवर जाणून बुझून त्या प्रसंगी अल्लाहचे नाव न घेतले जाईल ते हलाल आणि पाक नाही. तथापि याच्यातून असे स्वरूप अपवाद आहे, जी त्यांत ही शंका असेल की, जबाहच्या वेळी, जबाह करणाऱ्याने अल्लाहचे नाव घेतले किंवा नाही ? यात हा हुकूम आहे की, अल्लाहचे नाव घेऊन त्याला खाऊन घ्या. हदीसमध्ये येते की, ह.आयेशा رضي الله عنها नी

रसूल ﷺला विचारले की, काही लोक आमच्याजवळ मास घेऊन येतात. त्याच्याने अभिप्रेत ते ग्रामिण आहेत, जे नवे नवे मुसलमान झाले होते. आणि इस्लामी शिक्षण आणि चालीरितींशी पूर्णपणे परिचित पण झालेले नव्हते. आम्हांस ठाऊक नाही की त्यांनी अल्लाहचे नाव घेतले किंवा नाही? आपण ﷺनी फर्माविले, ''तुम्ही अल्लाहचे नाव घेऊन त्याला खाऊन घ्या.'' (स.बुखारी) म्हणजे शंकेच्या वेळी, ही सवलत आहे. याचा अर्थ असा नाही की, प्रत्येक प्रकारच्या जनावराचे मास, 'बिस्मिल्लाह्' म्हणून घेतल्याने हलाल होऊन जाईल. याने जास्तीत जास्त हे सिद्ध होते की, मुसलमानांच्या बाजारांत आणि दुकानांत मिळणारे मांस हलाल आहे. हां! जर कुणाला शंका कुशंका असेल, तर त्याने खातांना बिस्मिल्लाह म्हणून घ्यावे.

२) ज्याचा खुलासा याच अध्यायात पुढे येत आहे. याच्याशिवायपण आणखी अध्यायामध्ये तसेच हदीसमध्ये हराम गोष्टी तपशील वर्णन करून देण्यात आल्या आहेत. याचे शिवाय बाकी हलाल आहेत. आणि हराम प्राणी सुद्धा काहीच खाण्यास मिळाले नाही तर जीव वाचविण्यासाठी हलाल आहेत.

३) म्हणजे हेतुपुरस्सर अल्लाहचे नाव ज्या जनावरांवर घेतले गेले नाही; त्याचे खाणे, पाप आणि अयोग्य आहे. ह.इब्ने अब्बास ؓ नी पण याचा हाच अर्थ सांगितला आहे. ते म्हणता की, ''विसरून जाणाऱ्याला पापी म्हटले जात नाही.'' आणि इमाम बुखारीचा कल पण हाच आहे. आणि हाच हनफी लोकांचा मसलक आहे. तथापि इमाम शाफईचा मसलक हा आहे की, मुलसमानाने जबाह केलेले, दोन्ही स्वरूपांत हलाल आहे. की जरी त्याने अल्लाहचे नाव घ्यावे किंवा जाणून बुझून सोडून द्यावे. आणि ते 'इन्नहू ल फिस्कून' ला अल्लाहशिवाय इतरांच्या नावावर जबाह केल्या गेलेल्या जनावरांच्या बाबतीत ठरवितात.

४) शैतानाने आपल्या साथीदारांमार्फत ही गोष्ट पसरवली की, मुसलमान अल्लाहच्या कडून मेलेले जनावर (म्हणजे मृत) ला तर हराम आणि आपल्या हाताने जबाह केलेल्याला हलाल ठरवितात. आणि दावा करतात की, आम्ही अल्लाहला मानणारे आहोत. अल्लाहतआलाने म्हटले, की शैतान आणि त्याच्या मित्रांच्या काल्पनिक विचारांमागे लागू नका. जे जनावर मृत आहे, म्हणजे जबाह केल्याशिवाय मरून गेले (सागरी मृतांशिवाय की ते हलाल आहे.) कारण की यावर अल्लाहचे नाव घेतले गले नाही; म्हणून याचे खाणे हलाल नाही.

५) या महावाक्यात अल्लाहतआलाने काफिराला 'मय्यत' (मृत) आणि मोमिनला 'हय्य' (जिवंत) ठरविले आहे. यासाठी की काफिर 'कुफ्र' आणि मार्गभ्रष्टतेच्या अंध:कारात भटकत फिरतो. आणि त्याच्यातून निघतच नाही. ज्याचा परिणाम नष्ट होणे आणि बर्बादी आहे. आणि मोमिनच्या अंत:करणाला ईमानाच्या मार्फत जिवंत करून देतो. ज्यामुळे जीवनाच्या वाटा, त्याच्याकरीता प्रकाशित होऊन जातात. आणि तो ईमान आणि हिदायतच्या मार्गावर चालू लागतो. ज्याचा परिणाम साफल्य आणि सद्‌भाग्य आहे. हा तोच विषय आहे, जो खालील महावाक्यात वर्णन करण्यांत आला आहे. ''या दोन्ही पक्षकारांचे उदाहरण, आंधळे, व बहिरे आणि पाहणारे व ऐकणारे यांच्या सारखे आहे; काय हे दोन्ही तुलनेत बरोबर आहेत?'' (सू. हूद - २४) ''ईमान आणणाऱ्यांचा अल्लाहतआला मित्र आहे. तो त्यांना अंधकारातून प्रकाशाकडे घेऊन जातो. आणि काफिरांचे मित्र शैतान आहेत. ते त्यांना प्रकाशातून काढून अंधकारात घेऊन जातात. हे लोक नरकाग्नित जाणारे आहेत. ते नेहमी नरकाग्नितच पडून राहतील.'' (सू. बकर:-२५७) ''आणि आंधळा आणि डोळस (बघणारा) सारखे नाहीत आणि अंधार व प्रकाश आणि न सावली व उन आणि जीवंत व मृत समान होऊ शकत नाही.'' (सू.फातिर १९-२२)

६) 'अकाबिर' अकबर चे अनेकवचन आहे. अभिप्रेत काफिर आणि आज्ञाभंजकांचे मोठे लोक दोषारोपण करणारे आहेत. कारण हेच पैगंबर आणि सत्य आवाहकांच्या विरोधात पुढे पुढे राहतात; आणि सर्व सामान्य लोक तर त्यांच्यामागे लागणारेच असतात. म्हणून यांचा खास उल्लेख केला आहे. याशिवाय असे लोक साधारणपणे ऐहिक संपत्ती आणि खानदानी मोठेपणाच्या अनुषंगाने पण ठळक असतात. याचसाठी सत्त्याच्या विरोधात पण, प्रतिष्ठीत असतात. (हाच विषय सू.सबा आ.३१ ते ३३, सू.जुखरूफ-२३, सू.नूह-२२ वगैरेत सुद्धा वर्णन केला गेला आहे.)

७) म्हणजे त्यांच्या आपल्या खोडसळपणाचे ओझे आणि अशाचप्रकारे त्यांच्या मागे चालणाऱ्यांचे ओझेपण त्यांच्यावरच पडेल (आणखी पहा सू.अन्कबूत - १३, सू.नहल - २५)

८) म्हणजे त्यांच्याजवळ सुद्धा देवदूतांनी वह्य घेऊन यावे. आणि त्यांच्या डोक्यावर सुद्धा पैगंबरीचा मुकुट ठेवला जावा.

९) म्हणजे हा निर्णय करणे की, पैगंबर कोणास केले जावे? हे तर अल्लाहचेच काम आहे. कारण की तोच प्रत्येक गोष्टीचे वास्तव ज्ञान आणि योग्य तजविजीला जाणतो. आणि त्यालाच ठाऊक आहे की, कोण या पदाला योग्य आहे? मक्केचा कोणी चौधरी किंवा कोणी श्रीमंत किंवा अब्दुल्लाह् आणि ह.आमेनाचा अनाथ मुलगा?

فَمَنْ يُّرِدِ اللّٰهُ اَنْ يَّهْدِيَهٗ يَشْرَحْ صَدْرَهٗ لِلْاِسْلَامِ ۚ
وَمَنْ يُّرِدْ اَنْ يُّضِلَّهٗ يَجْعَلْ صَدْرَهٗ ضَيِّقًا حَرَجًا كَاَنَّمَا
يَصَّعَّدُ فِي السَّمَآءِ ؕ كَذٰلِكَ يَجْعَلُ اللّٰهُ الرِّجْسَ عَلَى
الَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿١٢٥﴾

तर ज्या माणसाला अल्लाहतआला सरळमार्गाला लावू इच्छील, त्याच्या अंत:करणाला इस्लामसाठी विस्तृत करून देतो. आणि ज्याला आडमार्गी भटकवू इच्छील, त्याच्या अंत:करणाला फार संकूचित करून देतो. जसा कोणी आकाशावर चढतो(१). अशाचप्रकारे अल्लाहतआला ईमान न आणणाऱ्यांवर अपवित्रता प्रस्थापित करतो(२) (१२५)

وَهٰذَا صِرَاطُ رَبِّكَ مُسْتَقِيْمًا ؕ قَدْ فَصَّلْنَا الْاٰيٰتِ
لِقَوْمٍ يَّذَّكَّرُوْنَ ﴿١٢٦﴾

आणि हाच तुझ्या पालनकर्त्याचा सरळमार्ग आहे. आम्ही उपदेश ग्रहण करणाऱ्यासाठी (आमच्या) महावाक्यांना स्पष्ट स्पष्ट वर्णन करून दिले (१२६)

لَهُمْ دَارُ السَّلٰمِ عِنْدَ رَبِّهِمْ وَهُوَ وَلِيُّهُمْ بِمَا كَانُوْا
يَعْمَلُوْنَ ﴿١٢٧﴾

या लोकांकरीता यांच्या पालनकर्त्याजवळ सुख शांतीचे घर आहे आणि त्यांच्या कर्मामुळे(३), अल्लाह त्यांच्याशी प्रीती राखतो (१२७)

وَيَوْمَ يَحْشُرُهُمْ جَمِيْعًا ۚ يٰمَعْشَرَ الْجِنِّ قَدِ اسْتَكْثَرْتُمْ
مِّنَ الْاِنْسِ ۚ وَقَالَ اَوْلِيٰٓؤُهُمْ مِّنَ الْاِنْسِ رَبَّنَا
اسْتَمْتَعَ بَعْضُنَا بِبَعْضٍ وَّبَلَغْنَآ اَجَلَنَا الَّذِيْٓ
اَجَّلْتَ لَنَا ؕ قَالَ النَّارُ مَثْوٰىكُمْ خٰلِدِيْنَ فِيْهَآ اِلَّا
مَا شَآءَ اللّٰهُ ؕ اِنَّ رَبَّكَ حَكِيْمٌ عَلِيْمٌ ﴿١٢٨﴾

आणि ज्या दिवशी अल्लाह सर्व सजीवांना गोळा करील (तेव्हा म्हणेल) हे जिन्नातांचा समूह! तुम्ही माणसांत मोठा वाटा घेतला(४). जी माणसे यांच्याबरोबर संबंध ठेवणारी होती, ते म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही एक दुसऱ्यापासून फायदा उचलला होता(५). आणि आम्ही या मुदतीस येऊन पोहचलो, जी तूआमच्यासाठी नेमून दिली होती(६). अल्लाह फर्माविल की, तुम्हा सर्वांचे ठिकाण नरकाग्नी आहे, ज्यात नेहमी राहाल. हां! पण जर अल्लाहलाच मंजुर असेल तर दुसरी गोष्ट(७) आहे. नि:संशय आपला पालनकर्ता बुद्धीमान आणि ज्ञानी आहे (१२८)

وَكَذٰلِكَ نُوَلِّيْ بَعْضَ الظّٰلِمِيْنَ بَعْضًا بِمَا كَانُوْا
يَكْسِبُوْنَ ﴿١٢٩﴾

आणि अशाचप्रकारे आम्ही काही काफिरांना काही काफिरांच्या जवळ ठेवू, त्यांच्या कर्मामुळे(८) (१२९)

يٰمَعْشَرَ الْجِنِّ وَالْاِنْسِ اَلَمْ يَاْتِكُمْ رُسُلٌ مِّنْكُمْ
يَقُصُّوْنَ عَلَيْكُمْ اٰيٰتِيْ وَيُنْذِرُوْنَكُمْ لِقَآءَ يَوْمِكُمْ
هٰذَا ؕ قَالُوْا شَهِدْنَا عَلٰٓى اَنْفُسِنَا وَغَرَّتْهُمُ الْحَيٰوةُ
الدُّنْيَا وَشَهِدُوْا عَلٰٓى اَنْفُسِهِمْ اَنَّهُمْ كَانُوْا
كٰفِرِيْنَ ﴿١٣٠﴾

हे जिन्नात आणि मानवांच्या समूहांनो! काय तुमच्याजवळ तुमच्यातूनच पैगंबर आले नव्हते? जे(९) तुम्हाला माझे आदेश सांगित, आणि तुम्हांस या आजच्या दिवसाची खबर देत असत? ते सर्व म्हणतील की आम्ही आपल्यावर कबूल करतो आणि त्यांना या जगाच्या जीवनाने फसवणूकीत टाकून ठेवले आणि हे लोक स्वत:च्या विरोधात साक्ष देतील की, ते काफिर होते (१०) (१३०)

ذٰلِكَ اَنْ لَّمْ يَكُنْ رَّبُّكَ مُهْلِكَ الْقُرٰى بِظُلْمٍ
وَّاَهْلُهَا غٰفِلُوْنَ ﴿١٣١﴾

हे अशासाठी आहे की, आपला पालनकर्ता कोण्या वस्तीवाल्यांना कुफ्र मुळे अशा स्थितीत नष्ट करीत नाही की, या वस्तीचे रहाणारे बेखबर असावेत(११) (१३१)

وَلِكُلٍّ دَرَجٰتٌ مِّمَّا عَمِلُوْا ؕ وَمَا رَبُّكَ بِغَافِلٍ
عَمَّا يَعْمَلُوْنَ ﴿١٣٢﴾

आणि प्रत्येकासाठी त्यांच्या कर्माप्रमाणे दर्जे मिळतील; आणि आपला पालनकर्ता(१२) यांच्या कर्माकडून बेखबर नाही (१३२)

وَرَبُّكَ الْغَنِيُّ ذُو الرَّحْمَةِ ؕ اِنْ يَّشَاْ يُذْهِبْكُمْ
وَيَسْتَخْلِفْ مِنْ بَعْدِكُمْ مَّا يَشَآءُ كَمَآ اَنْشَاَكُمْ مِّنْ
ذُرِّيَّةِ قَوْمٍ اٰخَرِيْنَ ﴿١٣٣﴾

आणि आपला पालनकर्ता बिलकुल निरपेक्ष आहे, दयाळू आहे(१३). जर तो इच्छिल तर तुम्हा सर्वांस उचलून घेईल; आणि तुमच्यानंतर ज्याला इच्छिल तुमच्या जागी आबाद करून देईल; जसे की तुम्हास दुसऱ्या लोकांच्या वंशातून पैदा केले आहे(१४) (१३३)

१) म्हणजे ज्याप्रमाणे जोर लावून आकाशावर चढणे शक्य नाही, अशाच प्रकारे ज्या माणसाच्या अंत:करणाला अल्लाहतआला संकूचित करून देईल, त्यांच्यात एकेश्वरवाद आणि ईमानचा प्रवेश होणे शक्य नाही पण हे की, अल्लाहतआलाच त्याचे अंत:करण उघडून देईन.

२) म्हणजे ज्याप्रमाणे अंत:करण संकूचित करून देतो; त्याचप्रमाणे 'रिज्स' मध्ये व्यस्त करून देतो. 'रिज्स' ने अभिप्रेत पलीदी म्हणजे घाणेरडापणा किंवा शिक्षा किंवा शैतानाचा काबू आहे.

३) म्हणजे ज्याप्रमाणे या जगांत ईमानवाले कुफ्र आणि मार्गभ्रष्टतेच्या रस्त्यांपासून वाचून ईमान आणि हिदायतच्या

सरळ मार्गावर चालत राहिले, आता परलोकातपण त्यांच्यासाठी सुखशांतीचे घर आहे. आणि अल्लाहतआलापण त्यांचा त्यांच्या चांगल्या कर्मामुळे मित्र आणि मददगार आहे.

४) म्हणजे मनुष्यांच्या एका मोठ्या संख्येला तुम्ही मार्गभ्रष्ट करून आपले अनुयायी बनवून घेतले. ज्याप्रमाणे अल्लाहतआलाने सू. यासीनमध्ये सांगितले, ''हे आदमाच्या मुलांनो! काय मी तुम्हास सावध करून दिले नव्हते, की तुम्ही शैतानाची पुजा करू नका. तो तुमचा उघड उघड शत्रू आहे. आणि हे की तुम्ही फक्त माझीच उपासना करावी, हाच सरळमार्ग आहे. आणि या शैतानाने तुमच्या एका मोठ्या संख्येला मार्गभ्रष्ट करून टाकले आहे. मग काय तुम्ही समजत नाही ? (सू. यासीन - ६० - ६२)

५) जिन्न आणि मनुष्यांनी एक दुसऱ्याकडून काय फायदा मिळविला? याचे दोन भावार्थ सांगितले जातात,जिन्नांचा मनुष्यांकडून फायदा उचलने, त्यांना आपला आज्ञाकारी बनवून आनंद प्राप्त करणे आहे, आणि मनुष्यांचा जिन्नांकडून फायदा उचलणे हा आहे की, शैतानांनी पापकर्मांना यांच्यासाठी शोभायमान बनवून दिले, ज्याला त्यांनी कबूल केले; आणि पापकर्माच्या लज्जतीत फसून राहिले. दुसरा भावार्थ हा आहे की, मनुष्ये त्या अदृष्ट बातम्यांना मान्यता देत राहिले; ज्या शैतान आणि जिन्नातांकडून भविष्य म्हणून पसरविल्या जात होत्या. हे जणू जिन्नातांचे माणसांना मूर्ख बनवून फायदा उचलणे आहे. आणि मनुष्यांचा फायदा उचलणे हे आहे की, मनुष्य जिन्नातांचे वर्णन केलेल्या खोट्या किंवा अटकळपंची गोष्टीपासून मजा लुटीत असत. आणि ज्योतिषी प्रकारचे लोक यांच्यापासून ऐहिक फायदे मिळवत राहिले.

६) म्हणजे कयामत घडून आली; जिला आम्ही जगात मानत नव्हतो. याच्या उत्तरांत अल्लाहतआलाने फर्माविले आता नरकाग्नी तुमच्यासाठी कायमचे ठिकाण आहे.

७) आणि अल्लाहची मर्जी, कफिरांकरीता नरकाग्नीची कायमची शिक्षा आहे. ज्याचे त्याने वारंवार कुरआन करीममध्ये स्पष्टीकरण करून दिले आहे. म्हणून यापासून कोणी गैरसमज करून घेऊ नये. कारण की, हे सर्व साधारण हुकूमापासून कोण्या माणसाला वेगळे करणे (इस्तसना) अल्लाहच्या इराद्याच्या वर्णनासाठी आहे; ज्याला कोण्या गोष्टीबरोबर सशर्त केले जाऊं शकत नाही. यासाठी जर तो काफिरांना नरकाग्नितून काढू इच्छिल तर काढू शकतो याकडून न तर तो असमर्थ आहे; न कोणी दुसरा त्याला अडविणारा आहे. (अयसरूत्तफासीर)

८) म्हणजे नरकाग्नीमध्ये; जसे की भाषांतराने स्पष्ट आहे. दुसरा भावार्थ हा आहे की, ज्याप्रमाणे आम्ही मनुष्ये आणि जिन्नातांना एक दुसऱ्याचे साथी आणि मददगार बनविले, (जसे की मागील आयतीत येऊन चुकले) अशाचप्रकारे आम्ही जालीमांशी व्यवहार करतो. एका जालीमाला दुसऱ्या जालीमावर प्रबळ करून देतो. अशाप्रकारे एक जालीम दुसऱ्या जालीमाला नष्ट आणि बर्बाद करतो. आणि एका जालीमाचा बदला, दुसऱ्या जालीमामार्फत घेऊन घेतो.

९) पैगंबरीच्या मामल्यात जिन्नात मनुष्यांच्याच ताब्यात आहे. म्हणून जिन्नातांमध्ये, वेगळे पैगंबर आले नाहीत. तथा पैगंबरांचा संदेश पोहचवणारे आणि अल्लाहकडून भिवविणारे, जिन्नांत मध्ये होत राहिले आहेत. जे आपल्या समाजातील जिन्नांना, अल्लाहकडे बोलवित राहिले आहेत, आणि बोलवत आहेत.

१०) कयामतच्या मैदानात काफिर वेगवेगळ्या चाली चालतील. कधी आपल्या 'शिर्क' करण्याला नाकारतील, (सू. अन्आम २३) आणि कधी मान्य केल्याशिवाय गत्यंतर राहणार नाही. जसे येथे त्याचे कबूल करणे नक्कल केले गेले आहे.

११) म्हणजे पैगंबरांच्या मार्फत आपल्या 'तर्क'ला कायम करीत नाही, नष्ट करीत नाही. जशी की, हीच गोष्ट सू.फातिर आ. २४, सू.नहल ३६, सू.बनी इस्राईल-१५ आणि सू. मुल्क ०८-९ वगैरे मध्ये वर्णन केली गेली आहे.

१२) म्हणजे प्रत्येक मनुष्य आणि जिन्नचे त्यांच्या आपसातील दर्जामध्ये कर्माप्रमाणे फरक आणि भेद राहील. याने हे पण ठाऊक झाले की, जिन्नातपण मनुष्यांप्रमाणे स्वर्गात जाणारे आणि नरकाग्नीत जाणारे होतील.

१३) तो 'गनी' (निरपेक्ष) आहे, आपल्या निर्मितीपासून तो त्यांचा मोहताज नाही तसेच त्यांच्या उपासनेची त्याला आवश्यकता नाही. त्यांच्या ईमानने त्याचा काही फायदा नाही तसेच त्यांचा 'कुफ्र' त्याला त्रासदायक नाही. परंतु या निरपेक्ष वृत्तीच्या बरोबर तो आपल्या मखलुकसाठी दयाळूपण आहे. त्याची निरपेक्षता, आपल्या मखलुकवर दया करण्यात आडवी येत नाही.

१४) हे त्याच्या अमर्याद शक्ती, आणि अमर्याद सामर्थ्याचे द्योतक आहे. ज्याप्रमाणे त्याने मागील कित्येक लोकसमूहांना चुकीच्या अक्षरासारखे मिटवून टाकले; आणि त्यांच्या जागी नवीन लोकसमूहांना आणून उभे केले तो आतासुद्धा या गोष्टीवर समर्थ आहे की जेव्हा इच्छील तेव्हा तुम्हाला होत्याचे न होते करून टाकेल आणि तुमच्या जागी असे लोक निर्माण करेल, जे तुमच्यासारखे नसतील (कृपया आणखी पहावे, सू.निसा - १३३, सू.इब्राहीम - १९,२० सू.फातिर - १५ ते १६, सू.महम्मद - ३८)

إِنَّ مَا تُوعَدُونَ لَآتٍ ۖ وَمَا أَنتُم بِمُعْجِزِينَ ﴿١٣٤﴾

**ज्या गोष्टीचा तुमच्याशी वायदा केला जात आहे, ती नक्कीच येणारी गोष्ट आहे; आणि तुम्ही भाग पाडू शकत नाही[१] (१३४)**

قُلْ يَا قَوْمِ اعْمَلُوا عَلَىٰ مَكَانَتِكُمْ إِنِّي عَامِلٌ ۖ فَسَوْفَ
تَعْلَمُونَ مَن تَكُونُ لَهُ عَاقِبَةُ الدَّارِ ۗ إِنَّهُ لَا يُفْلِحُ
الظَّالِمُونَ ﴿١٣٥﴾

**आपण सांगून टाका की, हे माझ्या लोकांनो! तुम्ही आपल्या जागी कर्म करीत रहा; मी पण कर्म करीत आहे[२], तर आता लवकरच तुम्हास माहीत होऊन जाईल की, परलोकाचा परिणाम कोणासाठी फायदे-कारक होईल. ह्यात शंकाच नाही की, जुलमी लोकांना कधी सफलता मिळणार नाही[३] (१३५)**

وَجَعَلُوا لِلَّهِ مِمَّا ذَرَأَ مِنَ الْحَرْثِ وَالْأَنْعَامِ نَصِيبًا
فَقَالُوا هَٰذَا لِلَّهِ بِزَعْمِهِمْ وَهَٰذَا لِشُرَكَائِنَا ۖ فَمَا كَانَ
لِشُرَكَائِهِمْ فَلَا يَصِلُ إِلَى اللَّهِ ۖ وَمَا كَانَ لِلَّهِ فَهُوَ
يَصِلُ إِلَىٰ شُرَكَائِهِمْ ۗ سَاءَ مَا يَحْكُمُونَ ﴿١٣٦﴾

**आणि अल्लाहतआलाने जी शेती आणि गुरे ढोरे उत्पन्न केली आहेत, त्या लोकांनी त्यातून काही वाटा अल्लाहचाही ठरविला आणि आपल्या कल्पनेप्रमाणे म्हणतात की, हा तर अल्लाहचा आहे. आणि हा आमच्या उपास्यांचा आहे[४]. मग जी वस्तू त्यांच्या उपास्यांची आहे, ती तर अल्लाहकडे पोहचत नाही[५]. आणि जी वस्तू अल्लाहची असते, ती त्यांच्या उपास्यांकडे पोहचून जाते[६]. किती वाईट निर्णय आहे, जो ते करतात (१३६)**

وَكَذَٰلِكَ زَيَّنَ لِكَثِيرٍ مِّنَ الْمُشْرِكِينَ قَتْلَ أَوْلَادِهِمْ
شُرَكَاؤُهُمْ لِيُرْدُوهُمْ وَلِيَلْبِسُوا عَلَيْهِمْ دِينَهُمْ ۖ وَلَوْ شَاءَ
اللَّهُ مَا فَعَلُوهُ ۖ فَذَرْهُمْ وَمَا يَفْتَرُونَ ﴿١٣٧﴾

**आणि अशाचप्रकारे पुष्कळशा मूर्तीपुजकांच्या विचारांत त्यांच्या उपास्यांनी त्यांच्या मुलांना ठार करण्याला सुशोभित (उत्तम) करून ठेवले आहे[७]. यासाठी त्यांनी त्यांस बर्बाद करावे आणि हे की, त्यांच्या धर्माला त्यांच्यासाठी शंकास्पद करून टाकावे[८]; आणि जर अल्लाहला मंजुर असते, तर यांनी असे काम केले नसते[९]; तर आपण यांना, आणि ज्या काही चुकीच्या गोष्टी हे बनवत आहे, त्यांना सोडून द्या (१३७)**

१) याच्याने अभिप्रेत कयामत आहे, ''आणि तुम्ही भाग पाडू शकत नाही.'' चा अर्थ आहे की, तो तुम्हांस दुसऱ्यांदा निर्माण करण्यास समर्थ आहे. मग जरी तुम्ही मातीत मिळून कण कण होऊन गेला असाल.

२) ही कुफ्र आणि पापावर कायम राहण्याची परवानगी नाही. परंतु कडक धमकी आहे. जसे की पुढच्या शब्दावरून पण स्पष्ट होते. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जे ईमान आणत नाही, त्यांना सांगून टाका ! तुम्ही आपल्या जागी कर्म करीत रहा; आम्हीपण कर्म करतो, आणि प्रतीक्षा करा आम्ही सुद्धा प्रतीक्षा करणारे आहोत.'' (सू.हूद - १२१-१२२)

३) जसे की थोड्याच कालावधीनंतर अल्लाहतआलाने आपला वायदा खरा करून दाखविला. ८ हिजरीमध्ये मक्का जिंकला गेला; आणि याच्या जिंकल्यानंतर अरब घराणी सैन्य दर सैन्य मुसलमान होणे सुरू होऊन गेले. आणि पूर्ण अरबी द्विपकल्प मुसलमानांच्या वर्चस्वाखाली येऊन लागला. आणि हे वर्तुळ मग पसरत आणि वाढतच चालले गेले.

४) या महावाक्यामध्ये मुशरिकांच्या या श्रद्धा आणि कर्माचा एक नमुना दाखविण्यात आला आहे. जे त्यांनी आपणाकडून घडवून ठेवले होते. ते जमिनीतून निघणारी उपज, आणि संपत्ती गुराढोरांमधून काही हिस्सा अल्लाहकरीता आणि काही आपल्या स्वत:च निर्मिलेल्या उपास्यांसाठी निश्चित करून घेत. अल्लाहच्या हिश्श्याला पाहुणे, फकीर आणि नाते संबंधावर खर्च करीत. आणि मूर्तींच्या हिशंश्याला मूर्तींचे मुजावर आणि त्यांच्या गरजांवर खर्च करतात. मग जर मूर्तींच्या निश्चित केलेल्या हिश्श्यांत अंदाजाप्रमाणे उपज झाली नाही तर, अल्लाहच्या हिश्शातून काढून, त्यांच्यात शामील करून घेत. आणि याच्या उलट मामला झाला, तर मूर्तींच्या हिश्श्यांतून काढत नसत. आणि म्हणत की अल्लाहतर गनी (म्हणजे निरपेक्ष) आहे.

५) म्हणजे अल्लाहच्या हिश्श्यांत कमीच्या स्वरूपांत; मूर्तींच्या निश्चित केलेल्या हिश्श्यांतून तर दानधर्म करीत नसत.

६) हां! जर मूर्तींच्या निश्चित केलेल्या हिश्श्यांत कमी होऊन जाईल, तर ते अल्लाहच्या नक्की केलेल्या हिश्श्यातून घेऊन, मूर्तींच्या गरजा आणि आवश्यकतांवर खर्च करीत असत. म्हणजे अल्लाहच्या तुलनेत मूर्तींचे मोठेपण आणि त्यांचे भय, त्यांच्या मनात जास्त होते. ज्याचा प्रत्यक्ष अनुभव आजच्या मूर्तीपुजकांच्या वर्तणुकीवरून सुद्धा केला जाऊ शकतो.

७) हा इशारा आहे, त्यांच्या मुलींच्या जिवंत पुरून देणे, किंवा मूर्तींना भेट चढवून देण्याकडे.

८) म्हणजे त्यांच्या धर्मात 'शिर्क' ची भेसळ करून द्यावी.

९) म्हणजे अल्लाहतआला आपल्या अधिकार आणि सामर्थ्याने, त्यांचे विचार आणि अधिकारांचे स्वातंत्र्य नष्ट करून टाकता, तर मग नक्कीच ते, ते काम न करते, जे चर्चिले गेले. परंतु असे करणे बळजबरी झाली असती, ज्यांत मनुष्याची कसोटी घेतली जाऊ शकत नव्हती. जेव्हा की अल्लाहतआला मनुष्याला विचार आणि अधिकाराचे स्वातंत्र्य देऊन त्याची परीक्षा घेऊ इच्छितो; म्हणून अल्लाहतआलाने बळजबरी केली नाही.

وَقَالُوا هٰذِهٖٓ اَنْعَامٌ وَّحَرْثٌ حِجْرٌ ۖ لَّا يَطْعَمُهَآ اِلَّا مَنْ نَّشَآءُ بِزَعْمِهِمْ وَاَنْعَامٌ حُرِّمَتْ ظُهُوْرُهَا وَاَنْعَامٌ لَّا يَذْكُرُوْنَ اسْمَ اللّٰهِ عَلَيْهَا افْتِرَآءً عَلَيْهِ ؕ سَيَجْزِيْهِمْ بِمَا كَانُوْا يَفْتَرُوْنَ ﴿١٣٨﴾

आणि ते आपल्या विचारांनी असेपण म्हणतात की, ही गुरेढोरे आहेत, आणि ही शेते आहेत; ज्यांचा उपयोग हरेक माणसाला योग्य नाही. यांना कोणी खाऊ शकत नाही; शिवाय त्यांच्या ज्यांना आम्ही इच्छू[१] आणि गुरे ढोरे आहेत, ज्यांच्यावर बसणे किंवा ओझे लादणे (म्हणजे माल वाहतूक) हराम करून[२] देण्यात आली आहे. आणि काही जनावरे आहेत, ज्यावर हे लोक अल्लाहतआलाचे नाव घेत नाहीत; निव्वळ अल्लाहवर खोटा आळ घेण्यासाठी[३]. आतांअल्लाहतआला त्यांना खोटे बोलण्याची शिक्षा देऊन टाकतो १३८

وَقَالُوْا مَا فِيْ بُطُوْنِ هٰذِهِ الْاَنْعَامِ خَالِصَةٌ لِّذُكُوْرِنَا وَمُحَرَّمٌ عَلٰٓى اَزْوَاجِنَا ۚ وَاِنْ يَّكُنْ مَّيْتَةً فَهُمْ فِيْهِ شُرَكَآءُ ؕ سَيَجْزِيْهِمْ وَصْفَهُمْ ؕ اِنَّهٗ حَكِيْمٌ عَلِيْمٌ ﴿١٣٩﴾

आणि ते म्हणतात की, जी वस्तू या जनावरांच्या पोटांत आहे, ती निव्वळ आमच्या पुरूषांसाठी आहे; आणि आमच्या स्त्रियांसाठी हराम आहे. आणि जर ते मृत आहे, तर त्यांत सर्व समान आहेत[४]. आता अल्लाह त्यांना त्यांच्या चुकीच्या सांगण्याबद्दल शिक्षा देऊन देत आहे[५]. नि:संशय तो बुध्दिमान व ज्ञानी आहे १३९

قَدْ خَسِرَ الَّذِيْنَ قَتَلُوْٓا اَوْلَادَهُمْ سَفَهًۢا بِغَيْرِ عِلْمٍ وَّحَرَّمُوْا مَا رَزَقَهُمُ اللّٰهُ افْتِرَآءً عَلَى اللّٰهِ ؕ قَدْ ضَلُّوْا وَمَا كَانُوْا مُهْتَدِيْنَ ﴿١٤٠﴾

खरोखर तोट्यांत पडून गेले ते लोक, ज्यांनी आपल्या मुलांना निव्वळ मूर्खपणामुळे कुठल्याही सनदीशिवाय मारून टाकले. आणि ज्या वस्तू अल्लाहतआलाने त्यांना खाण्यापिण्यासाठी दिल्या होत्या, निव्वळ अल्लाहवर खोटा आळ घेऊन, त्यांना निषीद्ध (हराम) करून घेतले. नि:संशय हे लोक मार्गभ्रष्टतेत पडून गेले, आणि कधी सरळ मार्गावर चालणारेही नव्हते १४०

وَهُوَ الَّذِيْٓ اَنْشَاَ جَنّٰتٍ مَّعْرُوْشٰتٍ وَّغَيْرَ مَعْرُوْشٰتٍ وَّالنَّخْلَ وَالزَّرْعَ مُخْتَلِفًا اُكُلُهٗ وَالزَّيْتُوْنَ وَالرُّمَّانَ مُتَشَابِهًا وَّغَيْرَ مُتَشَابِهٍ ؕ كُلُوْا مِنْ ثَمَرِهٖٓ اِذَآ اَثْمَرَ وَاٰتُوْا حَقَّهٗ يَوْمَ حَصَادِهٖ ۖ وَلَا تُسْرِفُوْا ؕ اِنَّهٗ لَا يُحِبُّ الْمُسْرِفِيْنَ ﴿١٤١﴾

आणि तोच आहे ज्याने बागा निर्माण केल्यात. त्यांत तर काही मांडवावर चढविले जातात; आणि ते पण आहेत जे चढविले जात नाहीत. आणि खजुरीचे वृक्ष आणि शेती जीत खाण्याच्या वेगवेगळ्या वस्तू तयार होतात[६] आणि जैतून आणि डाळींब जे आपसांत एक दुसऱ्याशी मिळते जुळते आहेत. आणि (काही) एक दुसऱ्याशी मिळती जुळतीपण नाहीत[७]. या सर्वांची फळे (तुम्ही) खा जेव्हा ते फळे देतील; आणि यात जो हक्क 'वाजीब' आहे, त्यांच्या कापणीच्या दिवशी, देऊन टाकत चला[८]. आणि मर्यादेच्या बाहेर जाऊ नका[९]. खचितच् तो मर्यादेच्यापुढे जाणाऱ्यांना नापसंत करतो[१०] १४१

وَمِنَ الْاَنْعَامِ حَمُوْلَةً وَّفَرْشًا ؕ كُلُوْا مِمَّا رَزَقَكُمُ اللّٰهُ وَلَا تَتَّبِعُوْا خُطُوٰتِ الشَّيْطٰنِ ؕ اِنَّهٗ لَكُمْ عَدُوٌّ مُّبِيْنٌ ﴿١٤٢﴾

आणि गुरांमध्ये काही उंच अंगकाठीचे आणि काही बैठ्या अंगकाठीचे[११] (निर्माण केले); जे काही अल्लाहने तुम्हांस दिले आहे खा[१२]; आणि शैतानाच्या पदोपदी चालू नका[१३]; नि:संशय तो तुमचा खुला शत्रू आहे १४२

१) यात त्यांच्या अडाणी धर्मशास्त्र आणि निरर्थकपणाचे तीन प्रकार आणखी वर्णन केले आहेत. ''हिज्‌रून'' (मना करण्याच्या अर्थात) जरी 'मसदर' आहे, परंतु 'मफऊल' म्हणजे 'महजुर' (मना केलेले) च्या अर्थात आहे. हा पहिला प्रकार आहे की, हे जनावर किंवा अमुक शेताचे उत्पन्न त्यांचा उपयोग मना आहे. याला फक्त तोच खाईल, ज्याला आम्ही परवानगी देऊ. ही परवानगी मूर्तींचे पुजारी आणि मुजावरांसाठीच रहात असे.

२) हा दुसरा प्रकार आहे की, ते वेगवेगळ्या प्रकारच्या जनावरांना आपल्या मूर्तींच्या नावे मुक्त सोडून देत असत; ज्यांच्याकडून ते ओझे वहाण्याचे किंवा स्वारीचे काम घेत नसत. जसे 'बहीरा' 'सायबा' वगैरेंचा तपशील पूर्वी येऊन चुकला आहे. (सू.माइदः – १०३ चा समास)

३) हा तिसरा प्रकार आहे की, ते 'जबाह' करतेवेळी फक्त आपल्या मूर्तींचे नाव घेत. काहींनी याचा भावार्थ हा सांगितला

आहे की, या जनावरांवर बसून ते हज करिता जात नसत. सारांश, हे सर्व प्रकार, त्यांनीच बनविले होते, परंतु अल्लाहवर खोटा आळ घेत. म्हणजे असे भासवित की, अल्लाहच्या हुकूमानेच, आम्ही सर्व काही करत आहोत.

४) हा आणखी एक प्रकार आहे की, जे जनावर ते आपल्या मूर्तींच्या नावे सोडीत असत, त्यांच्यातून काहीच्या बाबतीत म्हणत की, त्यांचे दूध आणि त्यांच्या पोटातून जन्माला येणारा जिवंत 'बच्चा' फक्त आमच्या पुरूषांसाठी हलाल आहे. स्त्रियांसाठी हराम आहे. हां, जर बच्चा मृत जन्मला असता, तर त्याच्या खाण्यात पुरुष व स्त्रिया समान आहेत.

५) अल्लाहतआलाने म्हटले की, हे जे चुकीचे विधान करीत आहेत, आणि अल्लाहवर कुभांड करीत आहेत. यावर लवकरच अल्लाहतआला त्यांना शिक्षा देईल. तो आपल्या निर्णयात बुद्धीमान आहे. आणि आपल्या सेवकांच्या बाबतीत चांगल्याप्रकारे ज्ञान बाळगणारा आहे. आणि आपल्या ज्ञान आणि बुद्धीप्रमाणे तो इनाम किंवा शिक्षेची व्यवस्था करील.

६) 'मअरूशात' चा 'माद्दा' 'अर्ष' आहे. ज्याचा अर्थ उंच करणे आणि उभारणे आहे. 'मअरूशात' ने अभिप्रेत, काही वृक्षांच्या त्या वेली आहेत ज्या ताटांवर (म्हणजे छप्पर मांडव वगैरे) वर चढविल्या जातात. जशी द्राक्षे आणि काही भाज्यांच्या वेली आहेत. आणि 'गैरेमआरूशात' ते वृक्ष आहेत, ज्यांच्या वेली वर चढविल्या जात नाही. परंतु जमिनीवरच पसरतात. जसे कलींगड, डांगर वगैरेंच्या वेली आहेत. किंवा ते खोडावाले वृक्ष आहेत, जे वेलीच्या स्वरूपांत नसतात. या सर्व वेली वृक्ष आणि खजुरीचे वृक्ष, आणि शेत्या ज्यांच्या चवी एक दुसऱ्यापासून वेगवेगळ्या असतात. आणि जैतफळ व डाळींब या सर्वांचा निर्माणकर्ता अल्लाह आहे.

७) याच्यासाठी पहा सू. अनआम आ. ९९ चा समास.

८) म्हणजे जेव्हा शेतीतून धान्य कापून स्वच्छ करून घ्याल; आणि फळे वृक्षांपासून तोडून घ्याल, तर त्याचा हक्क अदा करा. या हक्काने अभिप्रेत काही धर्मपंडितांजवळ नफील दानधर्म आहे. आणि काहींजवळ 'वाजिब सदका'म्हणजे उश्र – दहावा भाग, (जर जमीन पावसाच्या पाण्यावर असेल) किंवा निस्फ उश्र – विसावा भाग (जर जमीन, विहीर, ट्युबवेल किंवा पाटाच्या पाण्याने भिजविली जात असेल.)

९) म्हणजे दानधर्मामध्ये सुद्धा, मर्यादेच्या बाहेर जाऊ नका. असे न व्हावे की, उद्या तुम्ही गरजवंत होऊन जावे. काही म्हणतात की, याचा संबंध अधिकाऱ्यांशी आहे; म्हणजे सद्‌कात आणि जकातच्या वसुलीमध्ये मर्यादेच्या बाहेर जाऊ नका. इमाम इब्ने कसीर म्हणतात की, महावाक्याच्या विषयाच्या दृष्टीकोनांतून जास्त बरोबर, ही गोष्ट वाटते की,जेवणांमध्ये अती करू नका. कारण की जास्त खाणे बुद्धी आणि शरीर दोघांना ही त्रासदायक आहे. उधळपट्टी (इसराफ) चे हे सर्वच भावार्थ आपापल्या जागी योग्य आहेत. म्हणून सर्वच भावार्थ अभिप्रेत होऊ शकतात. दुसऱ्या ठिकाणांवर अल्लाहतआलाने खाण्यापिण्यात सुद्धा उधळपट्टी करण्याला मना केले आहे. ज्याच्याने स्पष्ट आहे की, खाण्यापिण्यांत सुद्धा मध्यममार्ग अनुसरणे फार आवश्यक आहे आणि त्यांत मर्यादेबाहेर जाणे, अल्लाहचा आज्ञाभंग करणे आहे. दुर्दैवाने आजकालच्या मुसलमानांनी या उधळपट्टीला आपल्या श्रीमंतीच्या प्रदर्शनाचे चिन्ह बनवून घेतले आहे. ''फइन्ना लिल्लाही व इन्ना इलैहि राजेऊन''

१०) यासाठी उधळपट्टी कोणत्याही गोष्टीत पसंत केली जात नाही. दानधर्म करण्यांत, न आणखी कोण्या गोष्टीत. प्रत्येक गोष्टीत मध्यमार्ग वांछीत आणि प्रिय आहे. आणि याचीच ताकीद केली गेली आहे.

११) 'हमूलतन' (ओझे उचलणारे) ने अभिप्रेत उंट,बैल,गाढव,खच्चर वगैरे आहेत. जे ओझे वहाण्याच्या कामांत येतात. आणि 'फरशाने' अभिप्रेत जमिनीला लागलेली जनावरे जसे मेंढी,बकरी,दुंबा वगैरे ज्यांचे तुम्ही दूध पितात किंवा मांस खातात.

१२) म्हणजे फळे, शेत्या आणि चतुष्पादांतून. या सर्वांना अल्लाहने निर्माण केले आहे. आणि त्यांना तुमच्यासाठी खाद्यपदार्थ बनविले आहे.

१३) ज्याप्रमाणे 'मुशरिकीन' याच्या मागे लागून गेले आणि हलाल जनावरांनापण आपल्यावर हराम करून घेतले. जणूंअल्लाहने हलाल केलेल्या वस्तूला हराम, किंवा हरामला हलाल करून घेणे, हे शैतानाचे अनुकरण आहे.

ثَمٰنِيَةَ اَزْوَاجٍ ۚ مِنَ الضَّاْنِ اثْنَيْنِ وَمِنَ الْمَعْزِ اثْنَيْنِ ؕ قُلْ ءٰٓالذَّكَرَيْنِ حَرَّمَ اَمِ الْاُنْثَيَيْنِ اَمَّا اشْتَمَلَتْ عَلَيْهِ اَرْحَامُ الْاُنْثَيَيْنِ ؕ نَبِّـُٔوْنِىْ بِعِلْمٍ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿١٤٣﴾

(निर्माण केलेत) आठ नर आणि माद्या[१] म्हणजे मेंढीत दोन प्रकार आणि बकरीत दोन प्रकार[२], आपण यांना सांगा की काय, अल्लाहने या दोन नरांना हराम केले आहे, किंवा दोन्ही माद्यांना किंवा याला की ज्याला दोन्ही माद्या पोटात घेऊन आहेत[३]; तुम्ही मला कोण्या पुराव्याने तर दाखवा जर (तुम्ही) खरे आहात[४] (१४३)

وَمِنَ الْاِبِلِ اثْنَيْنِ وَمِنَ الْبَقَرِ اثْنَيْنِ ؕ قُلْ ءٰٓالذَّكَرَيْنِ حَرَّمَ اَمِ الْاُنْثَيَيْنِ اَمَّا اشْتَمَلَتْ عَلَيْهِ اَرْحَامُ الْاُنْثَيَيْنِ ؕ اَمْ كُنْتُمْ شُهَدَآءَ اِذْ وَصّٰىكُمُ اللّٰهُ بِهٰذَا ۚ فَمَنْ اَظْلَمُ مِمَّنِ افْتَرٰى عَلَى اللّٰهِ كَذِبًا لِّيُضِلَّ النَّاسَ بِغَيْرِ عِلْمٍ ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يَهْدِى الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ﴿١٤٤﴾ ع ١٧/٤

आणि उंटात दोन प्रकार[५] आणि गायीत दोन प्रकार आपण (यांना) सांगा की काय, अल्लाहतआलाने या दोन नरांना हराम केले आहे, किंवा दोन्ही माद्यांना किंवा त्याला, ज्याला दोन्ही माद्या पोटांत घेऊन असतील; काय तुम्ही हजर होता, ज्यावेळेस अल्लाहतआलाने तुम्हास याचा हुकूम दिला[६]; तर यापेक्षाही जास्त जालीम कोण असेल, जो अल्लाहतआलावर पुराव्याशिवाय खोटा आळ घेईल[७]; कारण की लोकांना मार्गभ्रष्ट करावे. खचितच् अल्लाहतआला जालीम लोकांना मार्ग दाखवित नाही (१४४) ع १७/४/४

१) म्हणजे अल्लाहनेच आठ जोडे निर्माण केले, 'अज़्वाज' 'ज़ौज' चे अनेकवचन आहे. एकाच जातीतील नर आणि मादीला 'ज़ौज' (जोडा) म्हटले जाते. आणि या दोघांच्या एक एकाला पण 'ज़ौज' म्हणून घेतले जाते. कारण की प्रत्येक दुसऱ्यासाठी 'ज़ौज' असतो. कुरआनाच्या या स्थानावर सुद्धा, अजवाज (जोड्या) अफराद (लोक) च्याच अर्थात उपयोग करण्यात आला आहे. म्हणजे आठ अफराद (व्यक्ती) अल्लाहने निर्माण केले जे आपसांत एक दुसऱ्याचा जोडा आहेत. असे नाही की, 'ज़ौज' (जोड्याच्या अर्थात) निर्माण केले; कारण की अशाप्रकारे संख्या ८ च्या ऐवजी १६ होऊन जाईल; जी महावाक्याच्या पहिल्या भागाप्रमाणे होत नाही.

२) हे आठ ने बदल आहे. आणि अभिप्रेत दोन प्रकारचे नर आणि माद्या आहेत. म्हणजे मेंढ्या पासून नर आणि माद्या आणि बकरीपासून नर आणि माद्या निर्माण केले.

३) मुशरिकीन जे काही जनावरांना आपल्या कडूनच हराम करून घेत असत; याच्या हवाल्याने अल्लाहतआला विचारीत आहे की, अल्लाहतआलाने त्यांच्या नरांना हराम केले आहे, का माद्यांना किंवा त्या पिलांना जे दोन्ही माद्यांच्या पोटांत आहेत? अर्थ असा आहे की अल्लाहतआलाने तर, कोणालाही हराम केले नाही.

४) तुमच्याजवळ हराम ठरविण्याचा कोणी खात्रीलायक पुरावा आहे, तर सादर करा; की, 'बहीरा' 'सायबा' 'वसीला' आणि 'हाम' वगैरे, या पुराव्याच्या आधारावर हराम आहेत.

५) हे पण आठने बदल आहे. आणि येथेपण दोन दोन प्रकारांनी दोघांचे नर आणि माद्या अभिप्रेत आहेत. आणि अशाप्रकारे हे आठ प्रकार पूर्ण होऊन गेलेत.

६) म्हणजे तुम्ही जे काही जनावरांना हराम ठरवितात, काय जेव्हा अल्लाहने यांच्या निषिद्ध करण्याचा हुकूम दिला, तर काय तुम्ही त्यांच्याजवळ हजर होता? अर्थ हा आहे की, अल्लाहने तर त्यांच्या निषिद्ध होण्याचा कोणी हुकूमच दिला नाही. हे सर्व तुमचे कुभांड रचणे आहे; आणि अल्लाहवर खोटे थोपित आहात.

७) म्हणजे हाच सर्वांत मोठा जालीम आहे. हदीसमध्ये येते, नबी ﷺ नी फर्माविले, की मी अम्र बिन लुहय्याला नरकाग्नीमध्ये आपल्या आतड्या तानत असतांना पाहिले; यानेच सर्व प्रथम मूर्तींच्या नावे 'वसीला' आणि 'हाम' वगैरे जनावरे सोडण्याचा पायंडा पाडला होता. (स.बुखारी, स.मुस्लीम) इमाम इब्ने कसीर म्हणतात, हा अम्र बिन लुहय्या खुजाआ घराण्याच्या सरदारांमधून होता. जो जुरहुम् घराण्यानंतर खान-ए-काबाचा व्यवस्थापक बनला होता. याने सर्वप्रथम इब्राहीम ﵇ च्या धर्मांत बदल केला; आणि हिजाज मध्ये मूर्ती कायम करून लोकांना त्यांची उपासना करण्याचे आवाहन केले. आणि शिर्कवाल्या चालीरीती चालू केल्या. (इब्ने कसीर) सारांश, महावाक्याचा उद्देश हा आहे की, अल्लाहतआलाने चर्चित आठ प्रकारची जनावरे निर्माण करून आपल्या बंद्यांवर उपकार केला आहे. यांच्यातून काही जनावरांना आपल्याकडून हराम करून घेणे, अल्लाहच्या उपकाराचे खंडनपण आहे, आणि शिर्क करणेपण आहे.

قُلْ لَّآ اَجِدُ فِىْ مَآ اُوْحِىَ اِلَىَّ مُحَرَّمًا عَلٰى طَاعِمٍ يَّطْعَمُهٗٓ اِلَّآ اَنْ يَّكُوْنَ مَيْتَةً اَوْ دَمًا مَّسْفُوْحًا اَوْ لَحْمَ خِنْزِيْرٍ فَاِنَّهٗ رِجْسٌ اَوْ فِسْقًا اُهِلَّ لِغَيْرِ اللّٰهِ بِهٖ ۚ فَمَنِ اضْطُرَّ غَيْرَ بَاغٍ وَّلَا عَادٍ فَاِنَّ رَبَّكَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿١٤٥﴾

**आपण सांगून टाका की, जे काही आदेश 'वह्य ' च्या मार्फत माझ्याजवळ आलेत, त्यात मला काही हराम आढळून आले नाहीत, कोणा खाणाऱ्यासाठी की जो त्याला खाईल. परंतु हे की ते मुर्दाड असेल किंवा वहाते रक्त असेल, किंवा डुकरांचे मांस असेल, कारण की ते बिल्कुल अपवित्र आहे, किंवा जे पाप करण्यास कारणीभूत होईल कीं, जे अल्लाहशिवाय इतरांकरिता (बधले) व नाम निर्दीष्ट केले गेले असावे[१]; यावरही जो मनुष्य (भुकेने) व्याकूळ होऊन जाईल, या अटीवर की न तर तो अशा खाण्याला सोकावलेला असेल, आणि न तर (मर्यादेचे) उल्लंघन करणारा असेल, (तो अशापैकी काही खाऊन घेईल) तर तुमचा पालनकर्ता क्षमाकर्ता व दयाळू आहे** (१४५)

وَعَلَى الَّذِيْنَ هَادُوْا حَرَّمْنَا كُلَّ ذِىْ ظُفُرٍ ۚ وَمِنَ الْبَقَرِ وَالْغَنَمِ حَرَّمْنَا عَلَيْهِمْ شُحُوْمَهُمَآ اِلَّا مَا حَمَلَتْ ظُهُوْرُهُمَآ اَوِ الْحَوَايَآ اَوْ مَا اخْتَلَطَ بِعَظْمٍ ؕ ذٰلِكَ جَزَيْنٰهُمْ بِبَغْيِهِمْ ۖ وَاِنَّا لَصٰدِقُوْنَ ﴿١٤٦﴾

**आणि यहूद्यांवर आम्ही सर्व नखांवाली जनावरे, हराम करून दिली होती[२]. आणि गाय आणि बकरीमधून त्या दोघांची चरबी त्यांच्यावर आम्ही हराम करून दिली होती; परंतु ती जी त्यांच्या पाठीवर किंवा आतड्यांमध्ये लागली असेल किंवा हाडांना लागून असेल[३]. त्यांच्या खोडसळपणामुळे, आम्ही त्यांना ही शिक्षा दिली[४]. आणि आम्ही खचितच खरे आहोत[५]** (१४६)

१) या महावाक्यात ज्या चार निषिद्ध गोष्टींचा उल्लेख आहे, त्याचा आवश्यक तपशील सू.बकर: आ.क्र.१७३ च्या समासात येऊन चुकला आहे. या ठिकाणी हा मुद्दा आणखी खुलासायोग्य आहे की या चार निषिद्धांच्या उल्लेख निश्चित करण्यासाठी केला गेला आहे. याच्याने उघड असे वाटते की, या चार प्रकारांशिवाय बाकी सर्व जनावरे हलाल आहेत. जेव्हा की खरे असे आहे की, या चार शिवाय आणखी जनावरे सुद्धा शरिअत (धर्मशास्त्र) मध्ये हराम आहेत. मग येथे त्या चारवरच का जोर देण्यात का आले ? गोष्ट वास्तविक अशी आहे की, याच्यापूर्वी मुश्रिकांच्या अडाणी पद्धती आणि त्यांच्या खंडनाचे वर्णन चालू आहे. याच्यातच काही जनावरांचापण उल्लेख आला आहे; जे त्यांनी आपल्याकडून हराम करून ठेवले होते. याविषयाचे संदर्भात आणि त्याच्या अंतर्गत हे सांगण्यात येत आहे की, माझ्यावर जे वह्य केले गेले आहे, याच्यात तर याच्याने उद्देशीत मुशरिकांच्या हराम केलेल्या जनावरांचे हलाल होणे आहे; म्हणजे ते हराम नाहीत; कारण अल्लाहतआलाने ज्या हराम केलेल्या गोष्टींचा उल्लेख केला आहे, त्यांच्यात तर ते शामीलच नाहीत. जर ते हराम असते, तर अल्लाहतआला त्यांचा पण उल्लेख अवश्य करता. इमाम शौकानीने याचे कारण असे सांगितले आहे की, जर हे महावाक्य मक्की नसते; तर मग खचितच निषिद्धांचा समावेश मान्य करण्यायोग्य होता. परंतु ज्या अर्थी, याच्यानंतर स्वत: कुरआनाने सू.अल् माइद: मध्ये काही आणखी निषिद्ध वस्तूंचा उल्लेख केला आहे; आणि नबी ﷺ नी पण काही निषिद्ध वस्तू वर्णन केल्या आहेत; तर मग आता ते सुद्धा याच्यात शामील होतील. याच्याशिवाय नबी ﷺ नी पक्षी आणि श्वापदांचे हलाल व हराम माहित करून घेण्यासाठी दोन तत्त्व सांगून दिले आहेत. ज्यांचे स्पष्टीकरणपण चर्चित, त्याच समासांत उपस्थित आहे. 'अव् फिसकन्' चा 'अतफ' ''लह्मा खिन्जीरीन'' वर आहे. म्हणून 'मन्सुब' आहे. अर्थ आहे, ''ती जनावरे जी मूर्तींच्या नांवावर किंवा त्यांच्या स्थानावर त्याचे सामिप्य प्राप्त करण्यासाठी जबाह केली जातात म्हणजे अशा जनावरांवर जरी जबाह करतांना अल्लाहचे नांव घेतले गेले, तरी सुद्धा हराम होतील; कारण त्यांच्यामुळे अल्लाहचे सामिप्य नाही; अल्लाहशिवाय इतरांचे सामिप्य प्राप्त करण्याचा उद्देश आहे. 'फिस्क' पालनकर्त्याच्या आज्ञापालनातून बाहेर पडण्याचे नांव आहे. पालनकर्त्याने हुकूम दिला आहे की, अल्लाहतआलाच्या नांवावर जनावर जबाह केले जावे. आणि फक्त त्याच्याच सामिप्यासाठी आणि नवसासाठी केले जावे. जर असे केले गेले नाही तर हेच 'फिस्क' आणि शिर्क आहे.

२) नखांवाल्या जनावरांनी ती हातवाली जनावरे अभिप्रेत आहेत, ज्यांची बोटे दुभंगलेली नसतील म्हणजे वेगवेगळी नसावीत. जसे उंट, शहामृग, बदक, काज, गाय आणि बकरी वगैरे. अशी सर्व चरणारी गुरे, आणि पक्षी हराम होते. जणू फक्त ती जनावरे आणि पक्षी त्यांच्याखाली हलाल होते, ज्यांचे पंजे खुले असतील.

३) म्हणजे जी चरबी गाय किंवा बकरीच्या पाठीला असेल किंवा कण्याला चिपकलेली असेल किंवा आतड्या (किंवा ओझडी) किंवा हाडांबरोबर मिळालेली असेल, चरबीचे हे प्रमाण हलाल होते.

४) या गोष्टी आम्ही शिक्षा म्हणून, त्यांच्यावर हराम केल्या होत्या. म्हणजे यहूद्यांचा हा दावा बरोबर नाही की, या वस्तू ह.याकूब عليه السلام नी आपल्यावर हराम केल्या होत्या. आणि आम्ही तर त्यांच्या अनुकरणात यांना हराम समजतो.

५) याचा अर्थ असा आहे की, हे यहूदी नक्कीच आपल्या या दाव्यात खोटे आहेत.

فَإِن كَذَّبُوكَ فَقُل رَّبُّكُمْ ذُو رَحْمَةٍ وَاسِعَةٍ
وَلَا يُرَدُّ بَأْسُهُ عَنِ الْقَوْمِ الْمُجْرِمِينَ ﴿١٤٧﴾

मग जर हे आपणांस खोटे म्हणतील, तर आपण सांगून टाका की, तुमचा पालनकर्ता मोठा व्यापक दयानिधी आहे[१]. आणि त्याची शिक्षा पापी लोकांवरून टळणार नाही[२] ﴿١٤٧﴾

سَيَقُولُ الَّذِينَ أَشْرَكُوا لَوْ شَاءَ اللَّهُ مَا أَشْرَكْنَا
وَلَا آبَاؤُنَا وَلَا حَرَّمْنَا مِن شَيْءٍ ۚ كَذَٰلِكَ كَذَّبَ الَّذِينَ
مِن قَبْلِهِمْ حَتَّىٰ ذَاقُوا بَأْسَنَا ۗ قُلْ هَلْ عِندَكُم مِّنْ
عِلْمٍ فَتُخْرِجُوهُ لَنَا ۖ إِن تَتَّبِعُونَ إِلَّا الظَّنَّ وَإِنْ
أَنتُمْ إِلَّا تَخْرُصُونَ ﴿١٤٨﴾

हे मुश्रिकीन असेही म्हणतील की, जर अल्लाहतआलाला मंजुर असते, तर न आम्ही शिर्क करते, न आमचे वाडवडील आणि न आम्ही कोण्या वस्तूला हराम म्हणू शकलो असतो[३]; अशाचप्रकारे जे लोक यांच्यापूर्वी होऊन गेलेत, त्यांनीपण खोटे ठरविले होते; येथपर्यंत की त्यांनी आमच्या शिक्षेची गोडी चाखली[४]; आपण सांगा की काय तुमच्याजवळ कोणी पुरावा आहे, तर त्याला आमच्या समक्ष जाहीर करा[५]. तुम्ही लोक केवळ काल्पनिक गोष्टींवर चालत आहात; आणि तुम्ही केवळ अनुमानानेच गोष्टी बनवित असतात ﴿١٤٨﴾

قُلْ فَلِلَّهِ الْحُجَّةُ الْبَالِغَةُ ۖ فَلَوْ شَاءَ لَهَدَاكُمْ
أَجْمَعِينَ ﴿١٤٩﴾

आपण सांगा बस ! पूर्ण प्रमाण अल्लाहचेच राहिले. मग जर तो इच्छिता, तर तुम्हा सर्वांस सरळ मार्गावर घेऊन येता ﴿١٤٩﴾

قُلْ هَلُمَّ شُهَدَاءَكُمُ الَّذِينَ يَشْهَدُونَ أَنَّ اللَّهَ حَرَّمَ
هَٰذَا ۖ فَإِن شَهِدُوا فَلَا تَشْهَدْ مَعَهُمْ ۚ وَلَا تَتَّبِعْ أَهْوَاءَ
الَّذِينَ كَذَّبُوا بِآيَاتِنَا وَالَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِالْآخِرَةِ
وَهُم بِرَبِّهِمْ يَعْدِلُونَ ﴿١٥٠﴾

आपण सांगा की, आपल्या साक्षीदारांना आणा; जे या गोष्टीवर साक्षी देतील की अल्लाहतआलाने या वस्तूंना हराम करून दिले आहे[६]. मग जर ते साक्ष देऊन देतील, तर आपण त्यांच्याबरोबर साक्ष देऊ नका[७]. आणि अशा लोकांच्या निरर्थक विचारांप्रमाणे चालू नका. जे आमच्या निशाण्यांना नाकारतात, आणि ते जे परलोकावर विश्वास ठेवीत नाहीत. आणि ते आपल्या पालनकर्त्याबरोबर दुसऱ्यांना ठरवितात[८] ﴿١٥٠﴾

قُلْ تَعَالَوْا أَتْلُ مَا حَرَّمَ رَبُّكُمْ عَلَيْكُمْ ۖ أَلَّا تُشْرِكُوا بِهِ
شَيْئًا ۖ وَبِالْوَالِدَيْنِ إِحْسَانًا ۖ وَلَا تَقْتُلُوا أَوْلَادَكُم
مِّنْ إِمْلَاقٍ ۖ نَّحْنُ نَرْزُقُكُمْ وَإِيَّاهُمْ ۖ وَلَا تَقْرَبُوا
الْفَوَاحِشَ مَا ظَهَرَ مِنْهَا وَمَا بَطَنَ ۖ وَلَا تَقْتُلُوا
النَّفْسَ الَّتِي حَرَّمَ اللَّهُ إِلَّا بِالْحَقِّ ۚ ذَٰلِكُمْ وَصَّاكُم
بِهِ لَعَلَّكُمْ تَعْقِلُونَ ﴿١٥١﴾

आपण सांगून टाका की, या ! मी तुम्हांस त्या गोष्टी वाचून ऐकवितो, ज्यांना तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यावर हराम करून दिल्या आहेत[९]. त्या या की, अल्लाहच्या बरोबर कोण्या वस्तुला सरकतदार ठरवू नका[१०]. आणि आईबापाबरोबर उपकार करा[११]. आणि आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने मारून टाकू नका. आम्ही तुम्हाला (पण) आणि त्यांना (पण) रोजी देतो[१२]. आणि निर्लज्जतेचे जितके पण प्रकार आहेत, त्यांच्या जवळपण फटकू नका. मग ते उघड रीत्या असो किंवा गुप्तपणे; आणि ज्याचा खून करणे अल्लाहतआलाने हराम करून टाकला आहे, त्याला ठार करू नका; पण सत्य कारणामुळेच, मात्र[१३] यांचा तुम्हास ताकीदी हुकूम दिला आहे; की तुम्ही समजावे ﴿١٥١﴾

وَلَا تَقْرَبُوا مَالَ الْيَتِيمِ إِلَّا بِالَّتِي هِيَ أَحْسَنُ حَتَّىٰ
يَبْلُغَ أَشُدَّهُ ۖ وَأَوْفُوا الْكَيْلَ وَالْمِيزَانَ بِالْقِسْطِ ۖ
لَا نُكَلِّفُ نَفْسًا إِلَّا وُسْعَهَا ۖ وَإِذَا قُلْتُمْ فَاعْدِلُوا
وَلَوْ كَانَ ذَا قُرْبَىٰ ۖ وَبِعَهْدِ اللَّهِ أَوْفُوا ۚ ذَٰلِكُمْ
وَصَّاكُم بِهِ لَعَلَّكُمْ تَذَكَّرُونَ ﴿١٥٢﴾

आणि अनाथ बालकांच्या मालापाशीही जाऊ नका. पण अशा रीतीनेच मात्र की, जी उत्तम असेल. येथपावेतो की, तो आपल्या भरजवानीस पोहचेल[१४]. आणि माप तोल पुरा पुरा द्या. न्यायपुरस्सर[१५] आम्ही कोणत्याही मनुष्यावर त्याच्या शक्तीपलीकडे बोजा टाकीत नसतो. आणि[१६] जेव्हा तुम्ही गोष्ट कराल तेव्हा न्यायाचीच करा; जरी तो मनुष्य तुमचा आप्तच असेल; आणि अल्लाहतआलाशी जो करार केला असेल त्याला पुरा करा. यांचा अल्लाहतआलाने तुम्हास ताकीदी हुकूम दिला आहे; कारण की तुम्ही (यांची) आठवण ठेवावी ﴿١٥٢﴾

१) म्हणून यांनी नाकारल्यावर सुद्धा, शिक्षा देण्यात घाई करीत नाही.

२) म्हणजे सवलत देण्याचा अर्थ, नेहमी करता, अल्लाहच्या शिक्षेपासून सुरक्षित होणे नाही. तो जेव्हा ही शिक्षा देण्याचा निर्णय घेईल. मग त्याला कोणी टाळूशकणार नाही.

३) ही तीच चूक आहे, जी अल्लाहची मर्जी आणि अल्लाहची प्रसन्नता यांना एकाच अर्थात समजल्यामुळे होऊन जाते. वास्तविक हे एक दुसऱ्यापासून वेगळे आहेत. ज्याचे स्पष्टीकरण पहिले केले जाऊन चुकले आहे.

४) अल्लाहतआलाने या चुकीची दुरूस्ती अशाप्रकारे केली की जर हे 'शिर्क' अल्लाहच्या प्रसन्नतेचे द्योतक असते, तर मग त्यांच्यावर शिक्षा काआली? अल्लाहची शिक्षा या गोष्टीचा पुरावा आहे की, मर्जी वेगळी गोष्ट आहे आणि अल्लाहची प्रसन्नता वेगळी.

५) म्हणजे आपल्या दाव्यावर तुमच्याजवळ पुरावा आहे, तर सादर करा. परंतु त्यांचे जवळ पुरावा कोठे ? तेथे तर फक्त बौद्धिक कल्पनाविलास व कुभांडच आहे.

६) म्हणजे ती जनावरे, ज्यांना 'मुशरिकीन' ने हराम ठरविले होते.

७) कारण की त्यांच्याजवळ खोटे आणि कुभांडाशिवाय काही नाही.

८) म्हणजे त्याच्यासमान (बरोबरीचा) ठरवून शिर्क करतात.

९) म्हणजे हराम ते नाही ज्याला तुम्ही पुराव्याशिवाय, 'मा अन्जलल्लाहु' आपल्या निरर्थक बौद्धिक विचारांनी आणि वाईट गुमानाच्या आधारावर हराम ठरवून ठेवले आहे. किंबहुना हराम तर त्या वस्तू आहेत, ज्यांना तुमच्या पालनकर्त्याने हराम केले आहे. कारण की तुम्हाला निर्माण करणारा आणि तुमचा पालनहार तोच आहे. आणि प्रत्येक गोष्टीचे ज्ञानपण त्याच्याच जवळ आहे. म्हणून त्यालाच हा अधिकार पोहचतो की तो ज्या वस्तुला इच्छील हलाल, आणि ज्या वस्तुला इच्छील हराम करून देईल. जसे की मी तुम्हांस त्या गोष्टींचा तपशील दाखवत आहे; ज्याची ताकीद तुमच्या पालनकर्त्याने केली आहे.

१०) 'अल्ला तुशरिकु' च्या पूर्वी,'अव्साकुम्' 'महजुफ' आहे; म्हणजे अल्लाहतआलाने तुम्हास या गोष्टीचा हुकूम दिला आहे की, त्याच्याबरोबर कोण्या वस्तूला तुम्ही सरकतदार ठरवू नका. 'शिर्क ' सर्वात मोठे पाप आहे, ज्याच्यासाठी क्षमा नाही. शिर्क करणाऱ्यांवर स्वर्ग हराम, आणि नरकाग्नी लाजीम आहे. कुरआन मजीदमध्ये या सर्व गोष्टी वेगवेगळ्या प्रकारे वारंवार सांगण्यात आल्या आहेत. आणि नबी करीम ﷺ नी पण, हदीशीमध्ये याला तपशील आणि खुलाशासह वर्णन केले आहे. असे असून सुद्धा हे सत्य आहे की लोक शैतानाच्या बहकविण्यांत येऊन, शिर्कचे सर्रास पाप करतात. आणि शोकांतिका अशी आहे की, सर्व इस्लामी देशांमध्ये सुद्धा शिर्कचे प्रकटीकरण सर्रास आहे. जणू सुशोभित करून, त्यांच्यावर चांगल्या दिसणाऱ्या ढगांचे लेबल आणि सुंदर आच्छादने घालून दिली आहेत. परंतु दारूच्या बाटलीवर रूह अफजाचे लेबल लाऊन दिल्याने दारू हलाल होऊन जाणार नाही.

११) अल्लाहतआलाची तौहिद (एकेश्वरवाद) आणि आज्ञापालनानंतर येथेपण, (आणि कुरआनाच्या दुसऱ्या ठिकाणांवर सुद्धा) आईबापांशी सद्वर्तणुकीचा हुकूम दिला गेला आहे; ज्याच्याने ही गोष्ट स्पष्ट होते की, अल्लाहच्या आज्ञापालनानंतर आईवडीलांच्या आज्ञापालनाचे मोठे महत्त्व आहे. जर कोणी या 'रूबुबियते सुगरा' (आईवडीलांचे आज्ञापालन आणि त्यांचेशी सद्वर्तन) ची मागणी पूर्ण केली नाही.तर तो 'रूबुबियते कुबरा' च्या मागण्यापण पूर्ण करण्यात अयशस्वी राहील.

१२) अज्ञानकाळाचे हे अयोग्य काम आजकाल irth ontrol किंवा कुंटूंब नियोजनाच्या नावाखाली साऱ्या जगांत मोठ्या तेजीने आणि उत्साहाने चालू आहे. अल्लाहतआला यापासून सुरक्षित ठेवो! (आमीन)

१३) म्हणजे 'किसास' म्हणून फक्त जायजच नाही,किंबहुना जर वधित व्यक्तीचे वारस जर माफ करणार नाही; तर हे ठार करणे फारच आवश्यक आहे. ''वलकुम फिल किसासी हयातून'' (सू. बकर: १७९) ''किसास'' मध्ये तुमचे जीवन आहे.''

१४) ज्या अनाथ बालकांचे संगोपन तुमच्यावर जबाबदारी म्हणून टाकले जाईल, तर त्यांचे हरेक प्रकारे भले इच्छिणे तुमचे कर्तव्य आहे. याच भले इच्छिण्याची मागणी आहे, की जर त्याच्याजवळ संपत्ती आहे; म्हणजे वारसा हक्कातून त्याला वाटा मिळाला असेल, मग जरी ते रोकडच्या स्वरूपांत असो, किंवा जमीन, इस्टेटच्या स्वरूपांत. तथापि तो याचे संरक्षण करण्याची लायकी बाळगत नाही. त्याच्या संपत्तीचे त्या वेळेपर्यंत निर्मळ मनाने संरक्षण केले जावे; जो पर्यंत तो भरजवानीस आणि लायकीच्या वयास पोहचणार नाही. असे न व्हावे की संगोपनाच्या नावावर त्याच्या समजुतदार होण्याच्या वयापूर्वीच त्याची संपत्ती किंवा इस्टेट संपवून टाकली जावी.

१५) वजन मापात कमी करणे, घेतेवेळेला तर पूर्ण माप किंवा वजन करून घेणे; परंतु देते वेळीस असे न करणे, किंबहुना दांडी मारून, दुसऱ्याला कमी देणे. ही अत्यंत खालच्या दर्जाची चारित्र्यापासून पडलेली गोष्ट आहे. ह.शोएब عليه السلام च्या लोकांत हाच चारित्र्य विषयक रोग होता. जे त्यांच्या बर्बादीच्या कारणांतून एक कारण होते.

१६) येथे या गोष्टीचे वर्णन करण्यामध्ये हा उद्देश आहे की, ज्या गोष्टीची आम्ही तुम्हास ताकीद करीत आहोत, या अशा नाही की ज्यावर कर्म करणे, कठीण असावे. जर असे असते तर आम्ही याचा हुकूमच दिला नसता. यासाठी की, शक्तीपलीकडे आम्ही कोणाला कोण्या गोष्टीचा जबाबदार ठरवत नाही. म्हणून जर परलोकांत मुक्ती आणि दुनियेत सुद्धा सन्मान आणि प्रतिष्ठा इच्छित असाल, तर अल्लाहच्या या आदेशांवर अंमलबजावणी करा; आणि त्याच्यापासून पळ काढू नका.

وَأَنَّ هَٰذَا صِرَاطِي مُسْتَقِيمًا فَاتَّبِعُوهُ ۖ وَلَا تَتَّبِعُوا السُّبُلَ فَتَفَرَّقَ بِكُمْ عَن سَبِيلِهِ ۚ ذَٰلِكُمْ وَصَّاكُم بِهِ لَعَلَّكُمْ تَتَّقُونَ ﴿١٥٣﴾

**आणि हे की हा धर्म[१] माझा सरळ मार्ग आहे. म्हणून याच मार्गावर चाला[२], आणि दुसऱ्या मार्गावर चालू नका; की ते मार्ग तुम्हाला अल्लाहच्या मार्गापासून वेगळे करून टाकतील. याचा अल्लाहतआलाने तुम्हास ताकीदी हुकूम दिला आहे. कारण की तुम्ही भिऊन वागावे (१५३)**

ثُمَّ آتَيْنَا مُوسَى الْكِتَابَ تَمَامًا عَلَى الَّذِي أَحْسَنَ وَتَفْصِيلًا لِّكُلِّ شَيْءٍ وَهُدًى وَرَحْمَةً لَّعَلَّهُم بِلِقَاءِ رَبِّهِمْ يُؤْمِنُونَ ﴿١٥٤﴾

**मग आम्ही मूसाला पुस्तक दिले होते, ज्यामुळे चांगल्याप्रकारे कर्म करणाऱ्यांवर आमची देणगी पुरी व्हावी. आणि सर्व आदेशांचा खुलासा होऊन जावा आणि मार्गदर्शन व्हावे, आणि दया[३] व्हावी; कारण की त्या लोकांना आपल्या पालनकर्त्याला भेटण्याचा (पक्का) विश्वास पटावा (१५४)**

وَهَٰذَا كِتَابٌ أَنزَلْنَاهُ مُبَارَكٌ فَاتَّبِعُوهُ وَاتَّقُوا لَعَلَّكُمْ تُرْحَمُونَ ﴿١٥٥﴾

**आणि हे एक पुस्तक आहे, ज्यास आम्ही पाठविले मोठे बरकतवाले[४]; म्हणून त्याचे अनुपालन करा, आणि (अल्लाहला) भ्या, की तुमच्यावर दया केली जाईल (१५५)**

أَن تَقُولُوا إِنَّمَا أُنزِلَ الْكِتَابُ عَلَىٰ طَائِفَتَيْنِ مِن قَبْلِنَا وَإِن كُنَّا عَن دِرَاسَتِهِمْ لَغَافِلِينَ ﴿١٥٦﴾

**कोठे तुम्ही असे[५] न म्हणावे की, पुस्तक तर फक्त आमच्यापूर्वी दोन (यहूदी व खिस्ती) लोकसमूह होते त्यांच्यावर अवतीर्ण झाली होती. आणि आम्ही त्याच्या पठण पाठणापासून बिलकुल अजाण होतो[६] (१५६)**

१) 'हाज़ा' (हे) ने अभिप्रेत कुरआन मजीद किंवा इस्लाम धर्म किंवा ते आदेश आहेत, जे खास करून या अध्यायात वर्णन करून दिले गेले आहेत. आणि ते आहेत तौहीद (एकेश्वरवाद) पुन्हा जिवंत करून एकत्र करण्याचे ठिकाण आणि पैगंबरी आणि हीच इस्लामची तीन तत्त्वे आहेत. ज्याच्या सभोवार पूर्ण धर्म फिरतो आहे. म्हणून जे पण अभिप्रेत धरले जाईल, भावार्थ सर्वांचा एकच आहे.

२) सरळ मार्गाला, एकवचनाच्या 'सेग्या' ने वर्णन केले; कारण की, अल्लाहची किंवा कुरआनाची किंवा रसूलुल्लाह ﷺ ची वाट (मार्ग) एकच आहे. एकापेक्षा जास्त नाही. म्हणून अनुकरण फक्त याच एकामार्गाचे करावयाचे आहे. आणखी कोणाचे नाही. हाच मुस्लीम समाजाचे एक होणे आणि एकत्र होण्याचा पाया आहे. ज्यापासून दूर होऊन ही उम्मत वेगवेगळ्या पंथात आणि गटात विभागली गेली आहे. वास्तविक तिला ताकीद करण्यात आली आहे की, ''दुसऱ्या मार्गावर चालू नका; की ते मार्ग तुम्हाला अल्लाहच्या मार्गावरून वेगळे करून टाकतील.'' दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''धर्माला कायम ठेवा, आणि त्याच्यात फुट टाकू नका.'' (सू. शूरा - १३) जणू मतभेद आणि फुट टाकण्याची अजिबात परवानगी नाही. याच गोष्टीला हदीसमध्ये, नबी ﷺ नी अशा प्रकारे स्पष्ट केले की, त्यांनी ﷺ आपल्या हाताने एक रेषा ओढली आणि म्हटले की, ''हा अल्लाहचा सरळमार्ग आहे.'' आणि काही रेषा याच्या उजव्या आणि डाव्या बाजूला ओढल्या आणि म्हटले, ''हे मार्ग आहे ज्यांवर शैतान बसलेला आहे. आणि तो यांच्याकडे लोकांना बोलावित आहे.'' मग आपण ﷺ नी हेच महावाक्य पठन केले जे खुलाशाखाली आहे. (मुसनद अहमद) अहमद शाकीरने याला सही म्हटले. (पहावे मुसनद अहमद, अहमद शाकिरशी संबंधीत क्र. ४१४२) किंबहुना इब्ने माजाच्या रिवायतीमध्ये, खुलासा आहे की, दोन दोन रेषा उजवीकडे आणि डावीकडे काढल्या. म्हणजे एकूण चार रेषा काढल्या. आणि त्यांना शैतानाचा रस्ता सांगितले. परंतु तरी सुद्धा आज काल लोक म्हणतात की, सत्याचा मार्ग एक नाही, चार आहेत. आणि चारीही सत्त्यावर आहेत. 'इन् हाजा इल्ला शयऊन उजाब' वास्तविक पहाता अल्लाह फर्मावितो, ''सत्त्यानंतर मार्गभ्रष्टतेशिवाय आणखी काही नाही.'' (सू. यूनुस - ३२)

३) कुरआन करीमची ही पद्धती आहे, जी वेगवेगळ्या ठिकाणी पुन्हा पुन्हा सांगण्यात आली आहे; की जेथे कुरआनाचा उल्लेख होतो, तर तेथे तौरातचा आणि जेथे तौरातचा उल्लेख असेल, तेथे कुरआनाचा पण उल्लेख करून दिला जातो. याची अनेक उदाहरणे हाफिज़ इब्ने कसीरने दिली आहेत. याच पद्धतीप्रमाणे येथे तौरातचा आणि त्याच्या या चांगल्या वैशिष्ट्याचे वर्णन आहे की, ते पण आपल्या काळांतील एक परीपूर्ण पुस्तक होते. ज्यांत त्यांच्या धार्मिक गरजांच्या सर्व गोष्टी तपशीलवार वर्णन करण्यांत आल्या होत्या. आणि त्या मार्गदर्शनाला आणि दयेला कारणीभूत होत्या.

४) याच्याने अभिप्रेत कुरआन करीम आहे; ज्यात धर्म आणि दुनियाच्या बरकती आणि चांगल्या गोष्टी आहेत.

५) म्हणजे हे कुरआन यासाठी उतारले, कारण की तुम्ही असे न म्हणावे, दोन पंथांनी अभिप्रेत यहूदी आणि खिस्ती आहेत.

६) यासाठी की ती आमच्या भाषेत नव्हती. जसे की या सबबीला कुरआन अरबीत उतारून संपवून टाकण्यात आले.

أَوْ تَقُولُوا لَوْ أَنَّا أُنزِلَ عَلَيْنَا الْكِتَابُ لَكُنَّا أَهْدَىٰ مِنْهُمْ ۚ فَقَدْ جَاءَكُم بَيِّنَةٌ مِّن رَّبِّكُمْ وَهُدًى وَرَحْمَةٌ ۚ فَمَنْ أَظْلَمُ مِمَّن كَذَّبَ بِآيَاتِ اللَّهِ وَصَدَفَ عَنْهَا ۗ سَنَجْزِي الَّذِينَ يَصْدِفُونَ عَنْ آيَاتِنَا سُوءَ الْعَذَابِ بِمَا كَانُوا يَصْدِفُونَ ﴿١٥٧﴾

**किंवा असे न म्हणावे, की जर आमच्यावर कोणी पुस्तक अवतरीत झाले असते; तर आम्ही त्यांच्यापेक्षा सुद्धा जास्त सरळ मार्गावर राहतो. तर आता तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याकडून एक पुस्तक स्पष्ट आणि मार्गदर्शनाचे साधन, आणि दया येऊन चुकली आहे[१]. आता त्या मनुष्यांपेक्षा जालीम कोण असेल, जो आमच्या या महावाक्यांना खोटे म्हणेल आणि याच्या पासून रोकेल[२] आम्ही लवकरच त्या लोकांना जे आमच्या महावाक्यापासून रोकतात; त्यांच्या या रोकण्यामुळे, कडक शिक्षा देऊ** (१५७)

هَلْ يَنظُرُونَ إِلَّا أَن تَأْتِيَهُمُ الْمَلَائِكَةُ أَوْ يَأْتِيَ رَبُّكَ أَوْ يَأْتِيَ بَعْضُ آيَاتِ رَبِّكَ ۗ يَوْمَ يَأْتِي بَعْضُ آيَاتِ رَبِّكَ لَا يَنفَعُ نَفْسًا إِيمَانُهَا لَمْ تَكُنْ آمَنَتْ مِن قَبْلُ أَوْ كَسَبَتْ فِي إِيمَانِهَا خَيْرًا ۗ قُلِ انتَظِرُوا إِنَّا مُنتَظِرُونَ ﴿١٥٨﴾

**काय हे लोक फक्त या हुकूमाची वाट पाहत आहेत की, यांच्याजवळ देवदूतांनी यावे; किंवा यांच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याने यावे किंवा तुमच्या पालनकर्त्याची कोणी मोठी निशाणी यावी?[३] ज्या दिवशी आपल्या पालनकर्त्याची कोणी मोठी निशाणी येऊन पोहचेल, कोण्या अशा माणसाचे ईमान, त्याच्या कामी येणार नाही, जो पूर्वीपासून ईमान बाळगीत नाही[४]. किंवा ज्याने आपल्या ईमानात काही सुकृत्य केले नसावे[५]. आपण सांगून टाका की, तुम्ही प्रतिक्षेत रहा; आम्हीपण प्रतिक्षेत आहोत[६]** (१५८)

१) जणू ही सबब पण तुम्ही सांगू शकत नाही.

२) म्हणजे मार्गदर्शन आणि दयेच्या पुस्तकाच्या नंतर जो मनुष्य मार्गदर्शनाचा (इस्लामचा) मार्ग अनुसरून अल्लाहच्या दयेला पात्र बनत नाही, किंबहुना नाकारण्याचा आणि तोंड फिरवण्याचा मार्ग अनुसरतो, तर त्याच्यापेक्षा जास्त जालीम कोण आहे ? 'सदफा ' चा अर्थ तोंड फिरविण्याचा पण केला गेला आहे, आणि दुसऱ्यांना रोकण्याचा पण.

३) कुरआन मजीदचे अवतरण आणि ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीच्या मार्फत आम्ही सर्व आक्षेपांचे निरसन करून दिले आहे. आतासुद्धा जर हे आपल्या मार्गभ्रष्टतेपासून माघार घेत नाही, तर काय हे या गोष्टीची प्रतीक्षा करतात की, याच्यापाशी देवदूतांनी यावे, म्हणजे त्यांचे प्राण हरण करण्यासाठी, त्यावेळी हे ईमान आणतील? किंवा आपला पालनकर्ता त्यांच्या जवळ यावा, म्हणजे कयामत येऊन लागावी, आणि हे अल्लाहच्या समक्ष हजर केले जावेत. त्यावेळी हे ईमान आणतील? किंवा आपल्या पालनकर्त्याची कोणी मोठी निशाणी यावी जसे कयामतच्या जवळ सूर्य पूर्वेऐवजी पश्चिमेतून उदय व्हावा. तर अशा प्रकारची मोठी निशाणी पाहून हे ईमान आणतील ? पुढच्या महावाक्यात स्पष्टीकरण केले जात आहे की, जर हे या प्रतिक्षेत आहेत, तर फारच नादानीचे प्रदर्शन करीत आहेत. कारण की मोठ्या निशाणीचे जाहीर झाल्यानंतर काफिरांचे ईमान आणि आज्ञाभंजकाची व पापी माणसांची तौबा (पश्चात्ताप) मान्य केली जाणार नाही. सहीह हदीस आहे, नबी ﷺ नी फर्माविले की, ''कयामत कायम होणार नाही, येथपावेतो की, सूर्य (पूर्वेऐवजी) पश्चिमेकडून उदय पावेल. मग जेव्हा असे होईल, आणि त्याला पश्चिमेतून उदय होतांना पाहतील, तर सर्व ईमान घेऊन येतील.'' नंतर आपण ﷺ नी हे महावाक्य पठन केले, ''म्हणजे या वेळी ईमान आणणे, कोणाला फायदेकारक होणार नाही; ज्याने याच्यापूर्वी ईमान आणले नसेल.'' (स.बुखारी, तफसीर सू.अन्आम)

४) म्हणजे काफिराचे ईमान फायदेकारक म्हणजे मान्य होणार नाही.

५) याचा अर्थ आहे की, कोणी गुन्हेगार मोमिन (ईमानवाला) गुन्ह्यांपासून तौबा (पश्चात्ताप व्यक्त) करेल, तर त्या वेळची त्याची तौबा, कबूल केली जाणार नाही. आणि याच्यानंतर चांगली कर्मे (पण) कबूल होणार नाही. जशा की, हदीशी सुद्धा यावर समर्थन करतात.

६) हे ईमान न आणणाऱ्यांसाठी आणि तौबा न करणाऱ्यांसाठी धमकी आणि भिवविणे आहे. कुरआन करीममध्ये हाच विषय सू.मुहम्मद-१८ आणि सू. -मोमिन-८४/८५ मध्ये सुद्धा वर्णन केला गेला आहे.

إِنَّ الَّذِينَ فَرَّقُوا دِينَهُمْ وَكَانُوا شِيَعًا لَّسْتَ مِنْهُمْ فِي شَيْءٍ ۚ إِنَّمَا أَمْرُهُمْ إِلَى اللَّهِ ثُمَّ يُنَبِّئُهُم بِمَا كَانُوا يَفْعَلُونَ ﴿١٥٩﴾

**नि:संशय ज्या लोकांनी आपल्या धर्माला वेगळे वेगळे करून टाकले, आणि गट गट बनून गेलेत[१]; तुमचा त्यांच्याशी काही संबंध नाही बस, त्यांचा मामला अल्लाहच्या सुपूर्द आहे. मग यांना, यांचे केलेले जतवून देण्यात येईल (१५९)**

مَن جَاءَ بِالْحَسَنَةِ فَلَهُ عَشْرُ أَمْثَالِهَا ۖ وَمَن جَاءَ بِالسَّيِّئَةِ فَلَا يُجْزَىٰ إِلَّا مِثْلَهَا وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ﴿١٦٠﴾

**जो माणूस सुकृत्य करेल, त्याला त्याच्या दहापट मिळेल[२]. आणि जो मनुष्य कुकृत्य करेल, त्याला त्याच्या इतकीच शिक्षा मिळेल[३]. आणि त्या लोकांवर जुलूम केला जाणार नाही (१६०)**

قُلْ إِنَّنِي هَدَانِي رَبِّي إِلَىٰ صِرَاطٍ مُّسْتَقِيمٍ دِينًا قِيَمًا مِّلَّةَ إِبْرَاهِيمَ حَنِيفًا ۚ وَمَا كَانَ مِنَ الْمُشْرِكِينَ ﴿١٦١﴾

**आपण सांगून टाका की मला माझ्या पालनकर्त्याने एक सरळमार्ग दाखवून दिला आहे; की एक पक्का मजबूत धर्म आहे. जी पद्धत आहे ह.इब्राहीम (अ.) ची (हनीफ) जे फक्त अल्लाहशीच एकमग्न होते. आणि ते शिर्क करणाऱ्यांमधून नव्हते (१६१)**

قُلْ إِنَّ صَلَاتِي وَنُسُكِي وَمَحْيَايَ وَمَمَاتِي لِلَّهِ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿١٦٢﴾

**आपण सांगून द्या की, निश्चितच माझी नमाज आणि माझी सारी उपासना, आणि माझे जगणे आणि माझे मरणे हे सर्व निखालस अल्लाहसाठीच आहे; जो सकल जगांचा पालनकर्ता आहे (१६२)**

لَا شَرِيكَ لَهُ ۖ وَبِذَٰلِكَ أُمِرْتُ وَأَنَا أَوَّلُ الْمُسْلِمِينَ ﴿١٦٣﴾

**त्याचा कोणी सरकतदार नाही, आणि मला याचाच हुकूम झाला आहे. आणि मी सर्व मानणाऱ्यांमध्ये पहिला आहे[४] (१६३)**

قُلْ أَغَيْرَ اللَّهِ أَبْغِي رَبًّا وَهُوَ رَبُّ كُلِّ شَيْءٍ ۚ وَلَا تَكْسِبُ كُلُّ نَفْسٍ إِلَّا عَلَيْهَا ۚ وَلَا تَزِرُ وَازِرَةٌ وِزْرَ أُخْرَىٰ ۚ ثُمَّ إِلَىٰ رَبِّكُم مَّرْجِعُكُمْ فَيُنَبِّئُكُم بِمَا كُنتُمْ فِيهِ تَخْتَلِفُونَ ﴿١٦٤﴾

**आपण सांगून टाका की, काय मी अल्लाहच्याशिवाय आणखी कोणाला पालनकर्ता बनविण्याकरीता शोध घेऊ; वास्तविक तो मालक आहे प्रत्येक वस्तूचा[५] आणि कोणी मनुष्यपण काही कर्म करतो ते त्याच्यावरच रहाते. आणि कोणी कोण्या दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही[६]. मग तुम्हां सर्वांस आपल्या पालनकर्त्याजवळ जाणे होईल. मग तो तुम्हास विदीत करील, ज्या ज्या गोष्टीत तुम्ही मतभेद करीत होता[७] (१६४)**

وَهُوَ الَّذِي جَعَلَكُمْ خَلَائِفَ الْأَرْضِ وَرَفَعَ بَعْضَكُمْ فَوْقَ بَعْضٍ دَرَجَاتٍ لِّيَبْلُوَكُمْ فِي مَا آتَاكُمْ ۗ إِنَّ رَبَّكَ سَرِيعُ الْعِقَابِ وَإِنَّهُ لَغَفُورٌ رَّحِيمٌ ﴿١٦٥﴾

**आणि तो असा आहे ज्याने तुम्हाला जमिनीत खलीफा [८] बनविले आणि एकाचा दुसऱ्यावर दर्जा वाढविला. कारण की तुमची परीक्षा घ्यावी; त्या वस्तूंमध्ये ज्या तुम्हांस दिल्या आहेत[९]. नि:संशय तुमचा पालनकर्ता जलद शिक्षा देणारा आहे. आणि नि:संशय तो खरोखर मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१६५)**

१) याच्याने काही लोक, यहूदी व खिस्ती अभिप्रेत धरतात. जे वेगवेगळ्या गटांत, विभागले गेले होते. काही मुशरीकीन अभिप्रेत धरतात; की काही मुश्रिक देवदूतांची, काही ताऱ्यांची, काही वेगवेगळ्या मूर्तींची उपासना करीत असत. परंतु हे महावाक्य सर्वसाधारण आहे; काफिर आणि मुशरिकीनसह ते सर्व लोक याच्यांत शामील आहेत; जे अल्लाहच्या धर्माला आणि रसूलुल्लाह ﷺ च्या मार्गाला सोडून, दुसरा धर्म किंवा दुसऱ्या पद्धतीचा अंगिकार करून फुट टाकण्याचा व वेगवेगळे गट (पंथ) बनविण्याचा मार्ग स्वीकारतात. 'शियअ्न' चा अर्थ आहे, पंथ आणि गट आणि ही गोष्ट प्रत्येक त्या समाजाला लागू पडते, जी धर्माच्या बाबतीत, संगठीत होती; नंतर मग त्यांच्या वेगवेगळ्या व्यक्तींनी आपल्या कोण्या मोठ्याच्या मतालाच मान्य करणे आणि शेवटचा शब्द ठरवून आपला मार्ग वेगळा करून घेतला. मग जरी ते मत सत्य आणि पुण्याच्या विरूद्ध काअसेना! (फत्हुल कदीर)

२) हे अल्लाहतआलाच्या त्या कृपा आणि उपकाराचे वर्णन आहे, जे ईमानवाल्यांबरोबर तो करेल की, एका पुण्याचा बदला, दहा पुण्याबरोबर तो देईल. आणि हा कमीत कमी मोबदला आहे. नाहीतर कुरआन आणि हदीसींनी दोघांनी हे

सिद्ध आहे की, काही पुण्यांचा मोबदला कितीतरी शेकडोपटीने किंबहुना हजारो आणि लाखोपटीपर्यंत मिळेल.

३) म्हणजे ज्या गुन्ह्यांची शिक्षा निश्चित नाही; आणि त्याच्या केल्यानंतर त्याने तौबा पण केली नाही. किंवा त्याची सुकृत्ये त्याच्या कुकृत्यावर प्रबळ होणार नाही; किंवा अल्लाहने आपल्या खास कृपेने त्याला माफ केले नाही; (कारण की या सर्व प्रकारात सुट देण्याचा कायदा, कर्माच्या अनुषंगाने लागू होणार नही) तर मग अल्लाहतआला अशा कुकृत्याची शिक्षा देईल आणि त्याच्या बरोबरच देईल.

४) एकेश्वरवाद आणि अल्लाहचे उपास्यत्वाचे हेच आवाहन तमाम पैगंबरांनी दिले. ज्याप्रमाणे येथे शेवटच्या पैगंबराच्या शुभ मुखाने सांगण्यात आले की, ''मला याचा हुकूम दिला गेला आहे आणि मी सर्व मानणाऱ्यांमध्ये प्रथम आहे.'' दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआला ने फर्माविले, ''आम्ही आपल्यापूर्वी जेवढेपण पैगंबर पाठविले, प्रत्येकाला हेच 'वह्य' केले की, माझ्या शिवाय कोणी उपास्य नाही. बस, तुम्ही माझीच उपासना करा.'' (सू. अंबिया - २५) जसे की, ह.नूह ﷤ नी पण जाहीर केले, ''आणि मला हुकूम दिला की, मी पण आज्ञाधारकातून (मुसलमान) होऊन जावे.'' (सू. यूनुस - ७२) ह.इब्राहीम ﷤ च्या बाबतीत येते की, जेव्हा अल्लाहने त्यांना म्हटले 'अस्‌लिम्' (आज्ञाधारक होऊन जा) तर त्यांनी उत्तर दिले, ''मी सकल जगाच्या पालनकर्त्यासाठी मुसलमान (आज्ञाधारक) होऊन गेलो.'' (सू. बकरः - १२१) ह.इब्राहीम ﷤ ह व ह.याकूब ﷤ नी आपल्या मुलांना 'वसिअत' (मृत्यूच्यावेळी आज्ञा) केली ''तुम्हाला मृत्यू इस्लाम वर आला पाहिजे.'' (सू. बकर : १३२) ह. यूसुफ ﷤ नी दुआ केली, ''मला इस्लामच्या स्थितीतून जगातून उचलावे.'' (सू.यूसुफ १०१). ह.मूसा ﷤ नी आपल्या लोकांना सांगितले, ''जर तुम्ही मुसलमान आहात, तर याच्यावरच (अल्लाहवर) भरोसा ठेवा.'' (सू. यूनुस - ८४) ह.ईसा ﷤ च्या हवारींनी सांगितले, ''(तू) साक्षी रहा की, आम्ही मुसलमान आहोत.'' (सू. माइदः-१११) अशाप्रकारे आणखीही सर्व पैगंबरांनी आणि त्यांच्या अनुयायांनी याच इस्लामला स्वीकारले ज्यांत उपास्यत्वाच्या एकेश्वरवादाची पायाभूत अवस्था त्यांना प्राप्त झाली होती. जरी काही धर्मशास्त्रीय आदेश एक दुसऱ्यापेक्षा वेगळे होते.

५) येथे 'रब' ने अभिप्रेत तोच उपास्य मानणे आहे, ज्याचा इन्कार मुशरिकीन करीत आले आहे. परंतु मुशरिकीन याच्या पालनकर्ता होण्याला तर मानत होते; आणि याच्यात कोणाला सरकतदार ठरवीत नव्हते; परंतु त्याच्या उपास्यत्वांत सरकतदार ठरवीत असत.

६) म्हणजे अल्लाहतआला न्यायाचा परिपूर्ण बंदोबस्त करेल. आणि ज्याने चांगले किंवा वाईट जे काय केले असेल, याच्याप्रमाणे बक्षीस किंवा दंड देईल. सुकृत्यावर चांगला बदला आणि कुकृत्यावर शिक्षा देईल. आणि एकाचे ओझे दुसऱ्यावर टाकणार नाही.

७) म्हणून जर तुम्ही या एकेश्वरवादाच्या आवाहनाला मानत नाही, जे सर्व पैगंबरांचे एकमुखी आवाहन राहिले आहे; तर तुम्ही आपले काम करीत रहा; आम्ही आपले काम करीत राहू. कयामतच्या दिवशी, अल्लाहच्या दरबारांतच आमचा तुमचा निर्णय होईल.

८) म्हणजे सत्ताधारी बनवून, अधिकार दिले. किंवा एकानंतर दुसऱ्याला त्याचा वारसदार (प्रतिनिधी) बनविले.

९) म्हणजे, दारिद्र्य आणि श्रीमंती, ज्ञान आणि अज्ञान आरोग्य आणि आजार ज्याला जे काही दिले आहे; त्यात त्याची कसोटी घेणे आहे.

महावाक्ये २०६ | **(७)सू. अल-आअराफ** | रुकूअ २४

(٧) سُوْرَةُ الْاَعْرَافِ مَكِّيَّةٌ (٣٩) | اٰيَاتُهَا ٢٠٦ | رُكُوْعَاتُهَا ٢٤

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

الٓمّٓصٓ ①

**अलीफ लाम मीम स्वाद** ①

كِتٰبٌ اُنْزِلَ اِلَيْكَ فَلَا يَكُنْ فِيْ صَدْرِكَ حَرَجٌ مِّنْهُ لِتُنْذِرَ بِهٖ وَذِكْرٰى لِلْمُؤْمِنِيْنَ ②

**हे एक पुस्तक आहे, जे आपणाजवळ यासाठी पाठविण्यात आले आहे की, आपण याच्या मार्फत भिववावे; तर आपल्या मनांत याच्याने अजिबात संकोच न व्हावा[१]. आणि उपदेश आहे, ईमानवाल्यांसाठी.** ②

اِتَّبِعُوْا مَآ اُنْزِلَ اِلَيْكُمْ مِّنْ رَّبِّكُمْ وَلَا تَتَّبِعُوْا مِنْ دُوْنِهٖٓ اَوْلِيَآءَ ۭ قَلِيْلًا مَّا تَذَكَّرُوْنَ ③

**तुम्ही लोक याचे आज्ञापालन करा; जे तुमच्या पालनकर्त्याकडून आले आहे[२]. आणि अल्लाहतआलाला सोडून दुसऱ्या पुरस्कर्त्याचे अनुकरण करू नका. तुम्ही लोक फारच थोडा उपदेश मानतात** ③

وَكَمْ مِّنْ قَرْيَةٍ اَهْلَكْنٰهَا فَجَآءَهَا بَاْسُنَا بَيَاتًا اَوْ هُمْ قَآىِٕلُوْنَ ④

**आणि कित्येक वस्त्यांना आम्ही नष्ट करून टाकले; आणि त्यांच्यावर आमची शिक्षा रात्रीच्यावेळी पोहोचली; किंवा अशावेळी की ते दुपारच्या[३] वेळी विश्रांती घेत होते** ④

فَمَا كَانَ دَعْوٰىهُمْ اِذْ جَآءَهُمْ بَاْسُنَآ اِلَّآ اَنْ قَالُوْٓا اِنَّا كُنَّا ظٰلِمِيْنَ ⑤

**मग जेव्हा त्यांच्यावर आमची शिक्षा आली, त्यावेळी त्यांच्या तोंडातून याशिवाय आणखी कोणी गोष्ट निघाली नाही की, खरोखर आम्हीच जालीम होतो[४]** ⑤

فَلَنَسْـَٔلَنَّ الَّذِيْنَ اُرْسِلَ اِلَيْهِمْ وَلَنَسْـَٔلَنَّ الْمُرْسَلِيْنَ ۙ⑥

**मग् आम्ही त्या लोकांना अवश्य विचारू, ज्यांच्याजवळ पैगंबर पाठविले गेले होते, आणि आम्ही पैगंबरांना आवश्य विचारू[५]** ⑥

१) म्हणजे याच्या पोहोचण्याने आपले मन संकूचित होऊ नये की, कोठे काफिरांनी मला खोटे न ठरवावे; आणि मला इजा न पोहोचवावी यासाठी की, अल्लाह आपला संरक्षणकर्ता आणि मददगार आहे. किंवा 'हरजून' शंकेच्या अर्थात आहे. म्हणजे याच्या अल्लाहकडून नाजील होण्याच्या बाबतीत, आपण आपल्या अंत:करणात शंका बाळगू नये. खरे संबोधित तर उम्मत आहे की, त्यांनी शंका घेऊ नये.

२) जे अल्लाहकडून अवतरीत झाले आहे, म्हणजे कुरआन आणि जे रसूल ﷺ नी सांगितले म्हणजे हदीस; कारण आपण ﷺ नी सांगितले की, ''मला कुरआन आणि त्याच्या सारखे (हदीस) त्याच्या बरोबर दिले गेले आहे.'' या दोघांचे आज्ञापालन आवश्यक आहे. याच्याशिाय कोणाचे आज्ञापालन आवश्यक नाही; किंबहुना त्यांना नाकारणे लाजीम (जरूरी) आहे. जसे पुढील महावाक्यात सांगितले की, अल्लाहतआलाला सोडून दुसऱ्यांचे अनुपालन करू नका. ज्याप्रमाणे अज्ञान काळांत ज्योतिषी, सरदार व मांत्रिकांच्या सांगण्यावरून बातम्या देणाऱ्यांच्या गोष्टीला महत्त्व दिले जात असे. येथपावेतो की, हराम हलालमध्ये त्यांच्या सनदिला मान्यता दिली जात असे.

३) 'काईलून' 'कैलुलाह्' पासून आहे; जे दुपारच्या वेळी, विश्रांती घेण्याला म्हटले जाते. अर्थ हा आहे की, आमची शिक्षा अचानक अशा वेळी आली, जेव्हा ते आरामासाठी, बेखबर बिछान्यामध्ये झोप घेत होते.

४) परंतु शिक्षा आल्यानंतर असे मान्य करण्याचा काहीही फायदा नाही. जसे की पूर्वी स्पष्टीकरण होऊन चुकले आहे. ''जेव्हा त्यांनी आमची शिक्षा पाहून घेतली, तर त्यावेळी त्यांचे ईमान आणणे, त्याच्याकरीता फायदेमंद झाले नाही.'' (सू. मोमिन-८५)

५) उम्मतींना विचारले जाईल की, तुमच्याजवळ पैगंबर आले होते? त्यांनी तुम्हाला आमचा संदेश पोहचवला होता? तेथे ते उत्तर देतील की, होय; हे अल्लाह ! तुझे पैगंबर तर खचितच् आमच्याजवळ आले होते. परंतु आमचेच दुर्दैव आडवे आले की, आम्ही त्यांची पर्वा केली नाही. आणि पैगंबरांना विचारले जाईल, तुम्ही आमचा संदेश उम्मतींपर्यंत पोहचवला होता? आणि त्यांनी याच्या बाबतीत काय धोरण ठेवले? पैगंबर याचे उत्तर देतील. ज्याचा तपशील कुरआन मजीदमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी आलेला आहे.

فَلَنَقُصَّنَّ عَلَيْهِمْ بِعِلْمٍ وَّمَا كُنَّا غَآئِبِيْنَ ﴿٧﴾

मग आम्ही कारण की, पूर्ण माहिती बाळगतो, त्यांच्या समक्ष सांगून टाकू[१], आणि आम्ही काही गैरहजर तर नव्हतो ⑦

وَالْوَزْنُ يَوْمَئِذِ ِالْحَقُّ ۚ فَمَنْ ثَقُلَتْ مَوَازِيْنُهٗ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ﴿٨﴾

आणि त्या दिवशी वजनपण बिलकुल नीट होईल; मग ज्या माणसाचे पारडे जड होईल, तर असे लोक यशस्वी होतील ⑧

وَمَنْ خَفَّتْ مَوَازِيْنُهٗ فَاُولٰٓئِكَ الَّذِيْنَ خَسِرُوْٓا اَنْفُسَهُمْ بِمَا كَانُوْا بِاٰيٰتِنَا يَظْلِمُوْنَ ﴿٩﴾

आणि ज्या माणसाचे पारडे हलके होईल, तर हे असे लोक असतील, ज्यांनी आपले नुकसान करून घेतले, या कारणाने की, ते आमच्या महावाक्याशी अन्याय करीत होते[२] ⑨

وَلَقَدْ مَكَّنّٰكُمْ فِى الْاَرْضِ وَجَعَلْنَا لَكُمْ فِيْهَا مَعَايِشَ ۭ قَلِيْلًا مَّا تَشْكُرُوْنَ ﴿١٠﴾ ع

आणि नि:संशय आम्ही तुम्हांस पृथ्वीवर रहाण्याचे ठिकाण दिले; आणि आम्ही तुमच्याकरीता तिच्यांत उपजिवीकेची साधने ठेवली; तुम्ही लोक फारच कमी आभार मानतात ⑩

وَلَقَدْ خَلَقْنٰكُمْ ثُمَّ صَوَّرْنٰكُمْ ثُمَّ قُلْنَا لِلْمَلٰٓئِكَةِ اسْجُدُوْا لِاٰدَمَ ڰ فَسَجَدُوْٓا اِلَّآ اِبْلِيْسَ ۭ لَمْ يَكُنْ مِّنَ السّٰجِدِيْنَ ﴿١١﴾

आणि आम्ही तुम्हांस निर्माण केले[३]; मग आम्ही तुमचे रूप घडविले; मग आम्ही देवदूतांना सांगितले की, आदमला सज्द: करा; तेव्हा सर्वांनी सजदा केला, 'इबलीस' शिवाय; तो सजद: करणाऱ्यांमधून नव्हता. ⑪

قَالَ مَا مَنَعَكَ اَلَّا تَسْجُدَ اِذْ اَمَرْتُكَ ۭ قَالَ اَنَا خَيْرٌ مِّنْهُ ۚ خَلَقْتَنِىْ مِنْ نَّارٍ وَّخَلَقْتَهٗ مِنْ طِيْنٍ ﴿١٢﴾

हकतआलाने विचारले तू जे सजद: करीत नाही, तुला यापासून कोणत्या गोष्टीने अटकाव केला[४]? जेव्हा की मी तुला हुकूम देऊन चुकलो; म्हणू लागला मी त्याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे.आपण मला तर अग्नीपासून निर्माण केले आहे; आणि त्याला आपण मातीतून निर्माण केले आहेस[५] ⑫

قَالَ فَاهْبِطْ مِنْهَا فَمَا يَكُوْنُ لَكَ اَنْ تَتَكَبَّرَ فِيْهَا فَاخْرُجْ اِنَّكَ مِنَ الصّٰغِرِيْنَ ﴿١٣﴾

हकतआलाने फर्माविले, तू आकाशातून[६] खाली उतर तुला कुठलाही हक्क नाही की, तूआकाशांत राहून गर्व करावास. तर तू येथून बाहेर हो! नि:संशय तू क्षुल्लकांतून (एक क्षुल्लक) आहेस[७] ⑬

قَالَ اَنْظِرْنِىْٓ اِلٰى يَوْمِ يُبْعَثُوْنَ ﴿١٤﴾

त्याने सांगितले की, मला कयामतच्या दिवसापर्यंत अवकाश द्या ⑭

قَالَ اِنَّكَ مِنَ الْمُنْظَرِيْنَ ﴿١٥﴾

अल्लाहतआलाने सांगितले तुला अवकाश दिला गेला[८] ⑮

قَالَ فَبِمَآ اَغْوَيْتَنِىْ لَاَقْعُدَنَّ لَهُمْ صِرَاطَكَ الْمُسْتَقِيْمَ ﴿١٦﴾

त्याने म्हटले की जशी याच्यामुळे तू मला धुत्कारले[९]; नि:संशय, मी त्यांना रोकण्याकरता, तुझ्या सरळ मार्गावर बसेन ⑯

ثُمَّ لَاٰتِيَنَّهُمْ مِّنْۢ بَيْنِ اَيْدِيْهِمْ وَمِنْ خَلْفِهِمْ وَعَنْ اَيْمَانِهِمْ وَعَنْ شَمَآئِلِهِمْ ۭ وَلَا تَجِدُ اَكْثَرَهُمْ شٰكِرِيْنَ ﴿١٧﴾

मग त्यांच्यावर हल्ला चढवीन, त्यांच्या पुढून पण, आणि त्यांच्या मागून, आणि त्यांच्या उजवीकडूनपण आणि त्यांच्या डावीकडून[१०] पण आणि तू त्यांच्यातून बहुतेकांना आभार मानणारा पावणार नाही[११] ⑰

قَالَ اخْرُجْ مِنْهَا مَذْءُوْمًا مَّدْحُوْرًا ۭ لَمَنْ تَبِعَكَ مِنْهُمْ لَاَمْلَئَنَّ جَهَنَّمَ مِنْكُمْ اَجْمَعِيْنَ ﴿١٨﴾

अल्लाहतआलाने म्हटले की, येथून तुच्छ आणि बहिष्कृत होऊन निघून जा; जो मनुष्य त्यांच्यातून तुझे म्हणणे मानेल, मी जरूर तुम्हा सर्वांनी नरकाग्नीला भरून टाकीन ⑱

१) जसे की आम्ही प्रत्येक उघड आणि गुप्त गोष्टीचे ज्ञान ठेवतो; म्हणून आम्ही मग दोघांच्या (उम्मती आणि पैगंबर) समोर, सर्व गोष्टी वर्णन करू; आणि जे जे काही त्यांनी केले असेल, त्यांच्या समोर ठेवून देऊ..

२) या महावाक्यांमध्ये कर्मांच्या वजनाची समस्या वर्णन करण्यात आली आहे. जे कयामतच्या दिवशी होईल. आणि ज्याला कुरआन करीममध्ये सुद्धाअनेक ठिकाणी आणि हदिशीमध्ये सुद्धा वर्णन करण्यात आले आहे. ज्याचा अर्थ हा आहे की, तराजूमध्ये कर्म तोलले जातील, ज्याचे पुण्याचे पारडे जड होईल, तो यशस्वी आणि ज्याचे पापाचे पारडे जड

होईल, तो अयशस्वी होईल. हे कर्म कशाप्रकारे तोलले जातील, जेव्हा की, त्यांचे उघड अस्तित्व आणि शरीर नाही ? या बाबतीत एक मत तर हे आहे की, अल्लाहतआला कयामतच्या दिवशी त्यांना शरीरांत बदलून देईल; आणि त्यांचे वजन होईल. दुसरे मत असे आहे की, ती लिहिलेली पाने आणि रजिस्टर वजन केले जातील; ज्यांच्यात मनुष्यांची कर्मे नोंद केलेली असतील. तिसरे मत असे आहे की, खुद्द कर्म करणाऱ्याला तोलले जाईल. तिन्ही मसलकवाल्यांजवळ आपल्या मसलकच्या समर्थनार्थ सहीह हदीशी आणि सहाबा ﷺ चे म्हणणे हजर आहे. म्हणून इमाम इब्ने कसीर म्हणतात की, तिन्ही गोष्टी बरोबर असूशकतात. शक्य आहे कधी कर्म कधी कर्मपटाची पाने आणि कधी कर्म करण्याला तोलले जाईल. (पुराव्यासाठी पहा तफसीर इब्ने कसीर) तथापि तराजू आणि कर्मांच्या वजनाचा मसला कुरआन आणि हदीसने सिद्ध आहे. त्याला नाकारणे किंवा मूळ अर्थापासून त्याला फिरविणे, मार्गभ्रष्टता आहे. आणि सध्याच्या काळात तर याला नाकारण्याची आणखी काही शक्यता नाही. की वजन नसलेल्या वस्तुपण तोलल्या जाऊ लागल्या आहेत.

३) 'खल्कनाकुम्' मध्ये ज़मीर जरी अनेक वचनाचे आहे; परंतु अभिप्रेत मानवांचे पितामह ह.आदम عليه السلام आहेत.

४) 'अल्ला तसजुद' मध्ये 'ला' जास्तीचा आहे, म्हणजे 'अन् तसजुद' (तुला सजदा करण्यापासून कोणी रोकले ?) म्हणजे ''तुला कोणत्या वस्तू ने या गोष्टीवर भाग पाडले की, तू सजदा न करावा.'' (इब्ने कसीर व फत्हुल कदीर) शैतान, देवदूतांमधून नव्हता. किंबहुना स्वत: कुरआनाच्या खुलाशाप्रमाणे तो जिन्नतांमधून होता. (सू. कहफ - ५०) परंतु आकाशांत देवदूतांबरोबर राहिल्यामुळे त्या सजद्याच्या हुकूमात शामील होता; जो अल्लाहने देवदूतांना दिला होता. याचसाठी त्याची विचारपूस झाली. आणि त्याच्यावर तो फटकारला पण गेला. जर तो या हुकूमांत शामील नसता तर त्याची विचारपूस झाली नसती; तसेच तो अल्लाहच्या दरबारातून बहिष्कृत पण झाला नसता.

५) शैतानाची ही सबब ''गुन्ह्याची सबब गुन्ह्यापेक्षा वाईट असते.'' चा दोष दर्शक आहे. एक तर त्याचे हे समजणे की, श्रेष्ठाला, कमी दर्जावाल्याला सन्मान करण्याचा हुकूम दिला जाऊ शकत नाही; हे चूक आहे. यासाठी की मूळ गोष्ट तर अल्लाहचा हुकूम आहे; त्याच्या हुकूमाच्या तुलनेत श्रेष्ठ कनिष्ठाचा वाद, हुकूम न मानणे आहे. दुसरे त्याने श्रेष्ठ होण्याचा पुरावा हा दिला की, मी अग्नीपासून निर्माण झालो आहे आणि तो मातीपासून. परंतु त्याने त्या सन्मान आणि मोठेपणाला दृष्टीआड करून टाकले जो. ह.आदम عليه السلام ला प्राप्त झाला, की अल्लाहने त्यांना आपल्या हाताने बनविले; आणि आपल्याकडून त्यांच्यात आत्मा फुंकला. या सन्मानाच्या तुलनेत जगातली कुठली वस्तूपण होऊ शकते? तिसरे खुल्याआणि स्पष्ट हुकूमाच्या तुलनेत अंदाजाने काम घेतले. जो कोण्याही, अल्लाहला मानणाऱ्यांची पद्धत असू शकत नाही. या शिवाय त्याचा अंदाजपण खोडकर अंदाज होता. अग्नी,मातीहून कशी काय उत्तम आहे? अग्नीमध्ये प्रखरता, भडकणे आणि जाळून टाकण्याशिवाय आणखी काय आहे ? जेव्हा की, मातीत आराम आणि स्थैर्य आहे. इच्यात वनस्पती आणि त्या उपजविण्याची शक्ती, अधिकता आणि सुधारणा करण्याची क्षमता आहे. ही वैशिष्टे अग्नीपेक्षा केव्हाही उत्तम आणि जास्त फायदेकारक आहे. या महावाक्याने हे ठाऊक झाले की, शैतानाची निर्मिती अग्नीपासून झाली. जसे की, हदीसमध्ये पण येते की, देवदूत प्रकाशापासून, इब्लीस अग्नीच्या ज्वाळेपासून आणि आदम मातीपासून निर्माण केले गेले आहेत.'' (स.मुस्लीम्)

६) 'मिनहा' च्या जमीरचा मरजा, बहुतेक भाष्यकारांनी स्वर्गाला ठरविले आहे. आणि काहींनी त्या मर्तब्याला जो त्याला देवदूतांत प्राप्त होता. विद्वान भाषांतरकाराने, याच दुसऱ्या भावार्थाप्रमाणे, आकाश भाषांतर केले आहे.

७) अल्लाहच्या हुकूमाच्या मुकाबल्यात गर्व करणारा, मान सन्मानाचा नाही, तुच्छता आणि बहिष्कृततेचा हकदार आहे.

८) अल्लाहतआलाने त्याच्या इच्छेप्रमाणे त्याला अवकाश दिला; जो त्याची बुद्धीमत्ता, इरादा आणि मर्जी प्रमाणे होता. ज्याचे पूर्ण ज्ञान त्यालाच आहे. तथापि एक बुद्धीचातुर्य हे दिसते की, अशाप्रकारे तो आपल्या सेवकांची परीक्षा घेऊ शकेल की, कोण रहमान चा बंदा बनतो आणि कोण शैतानाचा पुजारी ?

९) मार्गभ्रष्ट तर तो, अल्लाहच्या विश्वनिर्मिती इच्छेअंतर्गत झाला; परंतु त्याने याला पण मुशरिकांप्रमाणे आरोप बनवून घेतला. ज्याप्रमाणे ते म्हणत असत, जर अल्लाहतआला इच्छिता तर आम्ही शिर्क केले नसते.

१०) अर्थ हा आहे की, प्रत्येक भलाई आणि बुराईच्या मार्गावर मी बसेन. भलाई पासून त्यांना मना करेल, आणि वाईटाला त्यांच्या नजरेत आवडते करून त्याला अंगिकार करण्याला प्रोत्साहन देईल.

११) शाकेरीन चा दुसरा अर्थ ऐकेश्वरवादी केला गेला आहे. म्हणजे बहुतेक लोकांना मी शिर्क मध्ये व्यस्त करून देईन. शैतानाने आपले हे गुमान खरोखर खरे करून दाखविले. ''शैतानाने आपले हे गुमान खरे करून दाखविले; आणि मोमिनांच्या एका गटाला सोडून, सर्व लोक याच्यामागे लागून गेले.'' (सू.सबा-२०) यासाठी हदीशीमध्ये शैतानापासून (अल्लाहचा) आश्रय मागण्याची, आणि कुरआनामध्ये त्याच्या फसवणुकी व चालबाजीपासून वाचण्याची मोठी ताकीद आली आहे.

وَيٰۤاٰدَمُ اسْكُنْ اَنْتَ وَزَوْجُكَ الْجَنَّةَ فَكُلَا مِنْ حَيْثُ شِئْتُمَا وَلَا تَقْرَبَا هٰذِهِ الشَّجَرَةَ فَتَكُوْنَا مِنَ الظّٰلِمِيْنَ ﴿١٩﴾

**आणि आम्ही हुकूम दिला की, हे आदम! तूआणि तुझी पत्नी स्वर्गांत रहा. मग जेथून तुम्हास हवे असेल (तेथून तुम्ही) दोघे खा; आणि या वृक्षाजवळ, जाऊ नका[१]; नाहीतर तुम्ही जालिमांतून होऊन जाल** ⑲

فَوَسْوَسَ لَهُمَا الشَّيْطٰنُ لِيُبْدِيَ لَهُمَا مَا وٗرِيَ عَنْهُمَا مِنْ سَوْاٰتِهِمَا وَ قَالَ مَا نَهٰىكُمَا رَبُّكُمَا عَنْ هٰذِهِ الشَّجَرَةِ اِلَّاۤ اَنْ تَكُوْنَا مَلَكَيْنِ اَوْ تَكُوْنَا مِنَ الْخٰلِدِيْنَ ﴿٢٠﴾

**मग शैतानाने त्या दोघांच्या मनांत वाईट विचार टाकला की[२], त्याने त्यांची काया, (गुप्तेंद्रिये) जी एक दुसऱ्याकडून झाकलेली होती; दोघांसमोर खुली[३] करून द्यावी. आणि म्हणू लागला की, तुमच्या पालनकर्त्याने, तुम्हा दोघांस, या वृक्षापासून आणखी कोण्या कारणाने मना केले नाही. परंतु केवळ यासाठी की, तुम्ही दोघे कोठे देवदूत बनून जाल, किंवा कोठे, नेहमी जिवंत राहणाऱ्यांमधून होऊन जाल** ⑳

وَ قَاسَمَهُمَاۤ اِنِّيْ لَكُمَا لَمِنَ النّٰصِحِيْنَ ﴿٢١﴾

**आणि त्या दोघांसमक्ष शपथ खाल्ली की, विश्वास ठेवा की, मी तुम्हा दोघांचा हितचिंतक आहे[४]** ㉑

فَدَلّٰىهُمَا بِغُرُوْرٍ ۚ فَلَمَّا ذَاقَا الشَّجَرَةَ بَدَتْ لَهُمَا سَوْاٰتُهُمَا وَطَفِقَا يَخْصِفٰنِ عَلَيْهِمَا مِنْ وَّرَقِ الْجَنَّةِ ؕ وَ نَادٰىهُمَا رَبُّهُمَاۤ اَلَمْ اَنْهَكُمَا عَنْ تِلْكُمَا الشَّجَرَةِ وَاَقُلْ لَّكُمَاۤ اِنَّ الشَّيْطٰنَ لَكُمَا عَدُوٌّ مُّبِيْنٌ ﴿٢٢﴾

**म्हणून या दोघांना फसवून खाली[५] घेऊन आला. मग, जेव्हा त्या दोघांनी त्या वृक्षाला चाखले तो लागलीच त्या उभयतांना आपली काया (गुप्तेंद्रिये) उघडी दिसू लागली; आणि ते दोघे, आपल्यावर स्वर्गाच्या बागांची पाने, जोडून जोडून ठेवू[६] लागले. आणि त्यांना त्यांच्या पालनकर्त्याने जोरात दटाविले, काय मी तुम्हास या वृक्षापासून मना केले नव्हते; आणि हे न सांगून चुकलो होतो की, शैतान तुमचा खुल्ला शत्रू आहे[७]** ㉒

१) म्हणजे या फक्त एका वृक्षाला सोडून जेथून आणि जितके इच्छाल, खा. एका वृक्षाचे फळ खाण्याची बंदी कसोटी म्हणून लागू करून दिली.

२) 'वसवसा' आणि विश्वास, जलजला आणि जिलजाल च्या वजनावर आहे. खालचा आवाज आणि मनाची गोष्ट, शैतान मनांत ज्या वाईट गोष्टी टाकतो, त्याला वसवसा म्हणतात.

३) म्हणजे शैतानाचा उद्देश, या बहकविण्याचा ह.आदम आणि हव्वाला, त्या स्वर्गाच्या पोषाखापासून वंचित करून, त्यांना लज्जीत करणे, हा होता; जो त्यांना स्वर्गात परिधान करण्यासाठी दिला गेला होता. 'सव्आत' 'सव्अतून' (गुप्तेंद्रिय) चे अनेकवचन आहे. गुप्तेंद्रियाला, 'सव्अतून' यासाठी संबोधित केले गेले की, त्याच्या उघड होण्याला, वाईट समजले जाते.

४) स्वर्गाच्या ज्या देणग्या आणि सुखसोयी ह.आदम आणि हव्वा यांना प्राप्त होत्या; त्यांचा हवाला देऊन शैतानाने त्या दोघांना फसविले, आणि असे खोटे सांगितले की, अल्लाह तुम्हांस नेहमी स्वर्गात ठेवू इच्छित नाही. म्हणून या वृक्षाचे फळ खाण्यास मना केले आहे. कारण की, याचा गुणधर्मच असा आहे की, जो याला खाऊन घेतो, तो देवदूत बनून जातो; किंवा त्याला कायमस्वरूपी जीवन प्राप्त होते. मग शपथ खाऊन त्यांचा हितचिंतक होणेपण जाहीर केले. ज्यामुळे ह.आदम आणि हव्वा प्रभावित होऊन गेले, यासाठी की अल्लाहवाले अल्लाहच्या नावावर सहजतेने फसतात.

५) तद्‌लिया आणि इद्‌लाअ् चा अर्थ आहे; कोण्या वस्तुला वरून खाली सोडून देणे. जणू शैतान त्यांना उंच मर्तब्यावरून उतारून प्रतिबंधित केलेल्या वृक्षाचे फळ खाण्यापर्यंत घेऊन आला.

६) हा त्या गुन्ह्याचा परिणाम जाहीर झाला, जो आदम عليه السلام आणि हव्वाकडून अजाणतेपणे आणि विचाराशिवाय झाला. मग उभयंता लज्जेमुळे बागेची पाने जोडून जोडून आपल्या गुप्तेंद्रियांवर ठेवू लागली. (गुप्तेंद्रियाला लपवू लागली.) वहब बिन मुनब्बा म्हणतात, याच्यापूर्वी त्यांना एक तसा, अल्लाहतआलाकडून नुरानी पोषाख मिळाला होता, तो जरी दिसणारा नव्हता तरी एक दुसऱ्याच्या गुप्तेंद्रियांसाठी झाकणारा होता. (इब्ने कसीर)

७) म्हणजे तुम्हाला ताकीद देऊन सुद्धा तुम्ही शैतानाच्या बहकविण्यात येऊन गेले. याने ठाऊक झाले की, शैतानाचे जाळे फार सुंदर आणि फसविणारे असते. आणि त्यापासून वाचण्यासाठी खूप प्रयत्न व परिश्रम आणि नेहमी त्याच्यापासून सावध रहाण्याची आवश्यकता आहे.

قَالَا رَبَّنَا ظَلَمْنَآ اَنْفُسَنَا ﵎ وَاِنْ لَّمْ تَغْفِرْ لَنَا وَتَرْحَمْنَا لَنَكُوْنَنَّ مِنَ الْخٰسِرِيْنَ ﴿٢٣﴾

**ते उभयंता म्हणू लागले की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही आपल्या जिवावर जुलूम केला, आणि जर तूआम्हास क्षमा करणार नाही; आणि आमच्यावर दया करणार नाही, तर खरोखरच आमचे मोठे नुकसान[१] होऊन जाईल ㉓**

قَالَ اهْبِطُوْا بَعْضُكُمْ لِبَعْضٍ عَدُوٌّ ۚ وَلَكُمْ فِي الْاَرْضِ مُسْتَقَرٌّ وَّمَتَاعٌ اِلٰى حِيْنٍ ﴿٢٤﴾

**हकतआलाने फर्माविले की, अशा स्थितीत खाली जा; की तुम्ही आपसांत एक दुसऱ्याचे शत्रू राहाल, आणि तुमच्या करीता पृथ्वीत राहण्याची जागा आहे; आणि एका नियमित वेळेपर्यंत फायदे घेणे आहे ㉔**

قَالَ فِيْهَا تَحْيَوْنَ وَفِيْهَا تَمُوْتُوْنَ وَمِنْهَا تُخْرَجُوْنَ ﴿٢٥﴾

**सांगितले, तुम्हाला तेथेच जीवन व्यतीत करावयाचे आहे. आणि तेथेच मरण आहे; आणि इच्यातून पुन्हा निर्माण होणे आहे ㉕**

يٰبَنِيْٓ اٰدَمَ قَدْ اَنْزَلْنَا عَلَيْكُمْ لِبَاسًا يُّوَارِيْ سَوْاٰتِكُمْ وَرِيْشًا ؕ وَلِبَاسُ التَّقْوٰى ۙ ذٰلِكَ خَيْرٌ ؕ ذٰلِكَ مِنْ اٰيٰتِ اللّٰهِ لَعَلَّهُمْ يَذَّكَّرُوْنَ ﴿٢٦﴾

**हे आदमच्या संतती आम्ही तुमच्यासाठी पोषाख निर्माण केला. जो तुमची काया झाकतो; आणि भूषणावहपण[२] होतो. आणि ईशभयाचा पोषाख[३], हा यापेक्षा ही चांगला[४] आहे, हे अल्लाहच्या निशाण्यांमधून आहे; कारण की लोकांनी मनन करावे ㉖**

१) पश्चात्ताप आणि क्षमा मागण्याचे तेच शब्द आहेत, जे ह.आदम ﵇ नी अल्लाह तबारकवतआलाकडून शिकले. जसे की,सू.बकर : आ. ३७ मध्ये खुलासा आहे. (पहा सदरील आयतीचा समास) जणू, शैतानाने अल्लाहच्या आज्ञाभंगाचा अपराध केला तर यावर तो नुसता अडून राहिला नाही किंबहुना त्याच्या योग्य होण्यावर आणि त्याच्या मान्यते साठी बौद्धिक आणि अंदाजित पुरावे देऊ लागला. त्याच्या परिणामांत तो अल्लाहच्या दरबारातून बहिष्कृत आणि नेहमी करता शापित ठरला. आणि ह.आदम ﵇ नी आपल्या चुकीवर पश्चात्ताप व्यक्त केला. आणि अल्लाहच्या समक्ष, तौबा आणि माफी मागितली. तर ते अल्लाहच्या दयेला आणि क्षमेला पात्र ठरले. अशाप्रकारे जणू दोन्ही मार्गाकडे अंगुली निर्देश होऊन गेला. शैतानाच्या मार्गाचापण आणि अल्लाहवाल्यांच्या मार्गाचापण. गुनाह करून त्यांच्यावर ऐट दाखविणे, त्यावर अडून राहणे, आणि तो योग्य आहे म्हणून पुराव्यांचे ढीग उभे करणे, हा शैतानाचा मार्ग आहे. आणि गुनाह केल्यानंतर पश्चात्तापाच्या भावनेने नम्र होऊन अल्लाहच्या बारगाहमध्ये नतमस्तक होणे आणि पश्चात्ताप व्यक्त करणे आणि क्षमा मागणे हा अल्लाहच्या बंद्यांचा मार्ग आहे. अल्लाहुमा जअलना मिनहुम्!

२) 'सव्आत' शरीराचे ते भाग ज्यांना झाकणे आवश्यक आहे. जसे गुप्तेंद्रिय आणि 'रिशा' तो पोषाख जो चांगले दिसण्यासाठी आणि शोभायमान दिसण्यासाठी घातला जावा. जणू पोषाखाचा पहिला प्रकार आवश्यकता म्हणून. आणि दुसरा प्रकार पूर्णत्व आणि वाढविण्यासाठी आहे. अल्लाहतआलाने या दोन्ही प्रकाराच्या पोषाखांसाठी साहित्य आणि त्याच्या सबबी निर्माण केल्या.

३) याच्याने अभिप्रेत काहींजवळ तो पोषाख आहे, जो सदाचरणी लोक कयामतच्या दिवशी परिधान करतील. काहींजवळ ईमान, काही जवळ सुकृत्ये, अल्लाहचे भय वगैरे आहेत. भावार्थ सर्वांचा जवळ जवळ एकच आहे; की असा पोषाख ज्याला घालून माणूस गर्व करण्याऐवजी अल्लाहला भीईल आणि ईमान आणि सुकृत्यांची पूर्तता करीन.

४) याच्याने हा भावार्थ पण निघतो की, सजावट आणि सुशोभित होण्यासाठी सुद्धा जरी पोषाख घालणे योग्य आहे, तरीसुद्धा पोषाखांत असा साधेपणा जास्त आवडता आहे, जो माणसाच्या सदाचरण आणि ईशभयाचा द्योतक असेल. याशिवाय नवा पोषाख परिधान केल्यानंतर ही दुआ पण पढली जावी; कारण की, नबी ﷺ ही दुआ पढत असत, ''अल्हम्दो लिल्ला हिल् लजी कसानी मा उवारी बिही अव्रती व अतजम्मलु बिही फी हयाती.'' (तिर्मिझी , इब्ने माजा) (अर्थ) ''सर्व स्तुती त्या अल्लाहसाठी आहे, ज्याने मला असा पोषाख परिधान करविला ज्याच्याने मी माझा 'सतर' झाकावा, आणि आपल्या जीवनांत तो भूषणास्पद व्हावा.''

يٰبَنِيْٓ اٰدَمَ لَا يَفْتِنَنَّكُمُ الشَّيْطٰنُ كَمَآ اَخْرَجَ اَبَوَيْكُمْ مِّنَ الْجَنَّةِ يَنْزِعُ عَنْهُمَا لِبَاسَهُمَا لِيُرِيَهُمَا سَوْاٰتِهِمَا ۭ اِنَّهٗ يَرٰىكُمْ هُوَ وَقَبِيْلُهٗ مِنْ حَيْثُ لَا تَرَوْنَهُمْ ۭ اِنَّا جَعَلْنَا الشَّيٰطِيْنَ اَوْلِيَاۗءَ لِلَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿٢٧﴾

**हे आदमच्या संतती! शैतान तुम्हांस कोण्या वाईट स्थितीत न टाकून देवो! जसे त्याने तुमच्या आई-वडिलांनी स्वर्गाच्या बाहेर काढून दिले; अशा स्थितीत की त्यांचा पोषाख पण उतरवून दिला की, त्याने त्यांना त्यांची काया उघडी करून दाखवावी.तो आणि त्याचे सैन्य, तुम्हाला अशाप्रकारे पाहतात, की तुम्ही त्यांना पाहत नाही[१]. आम्ही शैतानांना त्याच लोकांचे मित्र बनविले आहे; जे ईमान आणत नाही[२] २७**

وَاِذَا فَعَلُوْا فَاحِشَةً قَالُوْا وَجَدْنَا عَلَيْهَآ اٰبَاۗءَنَا وَاللّٰهُ اَمَرَنَا بِهَا ۭ قُلْ اِنَّ اللّٰهَ لَا يَاْمُرُ بِالْفَحْشَاۗءِ ۭ اَتَقُوْلُوْنَ عَلَي اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿٢٨﴾

**आणि ते लोक जेव्हा कोणी निर्लज्जपणाचे काम करतात, तेव्हा म्हणतात की, आम्ही आमच्या वाडवडीलांना असेच करताना पावलो आहोत; आणि अल्लाहने पण आम्हाला हेच दाखविले आहे; आपण सांगून टाका की, अल्लाहतआला निर्लज्जपणाच्या गोष्टीची शिकवण देत नसतो. काय तुम्ही अल्लाहकडे अशी गोष्ट लावतात; जिची तुमच्याजवळ कुठलीही सनद नाही[३] २८**

قُلْ اَمَرَ رَبِّيْ بِالْقِسْطِ ۣ وَاَقِيْمُوْا وُجُوْهَكُمْ عِنْدَ كُلِّ مَسْجِدٍ وَّادْعُوْهُ مُخْلِصِيْنَ لَهُ الدِّيْنَ ڛ كَمَا بَدَاَكُمْ تَعُوْدُوْنَ ﴿٢٩﴾ۭ

**आपण सांगून टाका की, माझ्या पालनकर्त्याने हुकूम दिला आहे न्यायाचा[४]; आणि हा की तुम्ही प्रत्येक सजद्याच्या वेळी, आपला चेहरा सरळ ठेवत चला[५]. आणि अल्लाहतआलाची उपासना अशा पद्धतीने करा; की या उपासनेला निखालस अल्लाहसाठीच ठेवा. तुम्हाला अल्लाहतआलाने ज्याप्रमाणे सुरवातीला निर्माण केले होते; अशाचप्रकारे तुम्ही दुसऱ्यांदा निर्माण व्हाल २९**

فَرِيْقًا هَدٰي وَفَرِيْقًا حَقَّ عَلَيْهِمُ الضَّلٰلَةُ ۭ اِنَّهُمُ اتَّخَذُوا الشَّيٰطِيْنَ اَوْلِيَاۗءَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ وَيَحْسَبُوْنَ اَنَّهُمْ مُّهْتَدُوْنَ ﴿٣٠﴾

**काही लोकांना अल्लाहने हिदायत दिली आहे. आणि काही आडमार्गी भटकण्यासच पात्र आहेत. या लोकांनी अल्लाहतआलास सोडून शैतानाला मित्र बनवून घेतले आहे; आणि त्यांना असे वाटते की ते योग्य मार्गावर आहेत ३०**

يٰبَنِيْٓ اٰدَمَ خُذُوْا زِيْنَتَكُمْ عِنْدَ كُلِّ مَسْجِدٍ وَّكُلُوْا وَاشْرَبُوْا وَلَا تُسْرِفُوْا ۚ اِنَّهٗ لَا يُحِبُّ الْمُسْرِفِيْنَ ﴿٣١﴾ ع ٣ ٦ ١٠

**हे आदमच्या संतती! तुम्ही मशिदीच्या प्रत्येक हजेरीच्या वेळी, आपला (भूषणास्पद) पोषाख परिधान करून घेत चला[६]. आणि खूप खा आणि प्या. आणि उधळपट्टी करू नका. नि:संशय अल्लाह उधळपट्टी करण्यास पसंत करत नाही[७] ३१** ३ ع ६ १०

قُلْ مَنْ حَرَّمَ زِيْنَةَ اللّٰهِ الَّتِيْٓ اَخْرَجَ لِعِبَادِهٖ وَالطَّيِّبٰتِ مِنَ الرِّزْقِ ۭ قُلْ هِىَ لِلَّذِيْنَ اٰمَنُوْا فِي الْحَيٰوةِ الدُّنْيَا خَالِصَةً يَّوْمَ الْقِيٰمَةِ ۭ كَذٰلِكَ نُفَصِّلُ الْاٰيٰتِ لِقَوْمٍ يَّعْلَمُوْنَ ﴿٣٢﴾

**आपण सांगा की, अल्लाहतआलाच्या निर्माण केलेल्या साज श्रृंगाराच्या वस्तूंना (कपड्यांना) जे त्याने आपल्या सेवकांसाठी बनविले आहे. आणि खाण्यापिण्याच्या हलाल वस्तूंना कोण्या माणसाने हराम केले आहे? आपण सांगून द्या की, या वस्तू, इहलोकात मोमिनांसाठी संयुक्त आहेत[८], कयामतच्या दिवशी फक्त खास त्यांच्याचसाठी असतील. आम्ही अशाचप्रकारे सर्व महावाक्यांना, समजदार लोकांकरीता साफ साफ वर्णन करतो ३२**

---

१) यात ईमानवाल्यांना शैतान आणि त्यांचे घराणे म्हणजे त्यांच्या चेल्यांपासून सावध केले गेले आहे की, कोठे तुमचा निष्काळजीपणा आणि आळसाने फायदा उचलून तुम्हालाही अशाप्रकारे फितन्यात आणि मार्गभ्रष्टतेत न टाकून द्यावे, ज्याप्रमाणे तुमचे आई बाप (आदम व हव्वा) यांना त्याने स्वर्गातून काढून लावले; आणि स्वर्गाचा पोषाख पण उतरवून घेतला. विशेष म्हणजे ते दिसतपण नाहीत. म्हणून त्यांच्यापासून वाचण्याचा बंदोबस्त आणि काळजीपण जास्त घेतली जावी.

२) म्हणजे ज्या लोकांजवळ ईमान नाही असे लोकच त्यांचे दोस्त आणि त्यांची शिकार आहेत. तथापि तो ईमानवाल्यांना सुद्धा धोका देऊन, आपल्याकडे आकर्षित करतो. काही आणखी नाही, तर शिर्कखफी (रियाकारी अल्लाहला सोडून दुसऱ्यांना दाखविण्यासाठी पुण्याची कामे करणे) आणि खुल्या शिर्कमध्येच त्यांना व्यस्त करून

देतो. आणि अशाप्रकारे त्यांना सुद्धा ईमानानंतर ईमानाच्या खऱ्या दौलतीपासून वंचित करून देतो.

३) इस्लामच्यापूर्वी मुश्‌रिकिन बैतुल्लाहला नग्न होऊन प्रदक्षिणा घालत असत. आणि म्हणत की, आम्ही त्या स्थितीला अंगिकारून प्रदक्षिणा करतो, ती त्यावेळी होती; जेव्हा आम्हाला आमच्या आईंनी जन्म दिला होता. काही म्हणतात की, ते याचे असे कारण सांगत की, आम्ही जे कपडे घालतो; त्यांत आम्ही अल्लाहचा आज्ञाभंग करीत रहातो. म्हणून अशा कपड्यांत प्रदक्षिणा करणे योग्य नाही. यासाठी ते कपडे उतारून प्रदक्षिणा घालत; आणि स्त्रियापण नग्न प्रदक्षिणा घालत. फक्त आपल्या गुप्तेंद्रियावर कोणी कपडा किंवा चामड्याचा तुकडा ठेवून घेत. आपल्या या लज्जास्पद कृत्यासाठी दोन कारणे, त्यांनी आणखी पुढे केली. एक तर हे की, आम्ही आमच्या वाड वडिलांस असे करताना पावलो आहोत. दुसरे हे की, अल्लाहने आम्हांस याचा हुकूम दिला आहे. अल्लाहतआलाने याचे खंडन केले की, हे कशा प्रकारे होऊ शकते की, अल्लाहतआला निर्लज्जतेचा हुकूम देईल ! म्हणजे तुम्ही अल्लाहकडे ती गोष्ट लावतात, जी त्याने सांगितली नाही. या महावाक्यांमध्ये त्या अंधानुकरण करणाऱ्यांसाठी (मुकल्लीदीन) मोठी फटकार आहे, जे वाडवडीलांचे अनुकरण पीर पुजा आणि व्यक्तीपूजामध्ये व्यस्त आहेत; जेव्हा त्यांनापण सत्य गोष्ट सांगितली जाते, तर तिच्या मुकाबल्यात, हीच सबब पुढे करतात की, आमचे मोठे हेच करीत आले आहेत; किंवा आमचे इमाम व पीर आणि शेख यांचा हाच हुकूम आहे. हा तोच दुर्गुण आहे, ज्याच्यामुळे यहूदी यहूदियत वर, ख्रिस्ती ख्रिस्तत्वावर, आणि बिदअती आपल्या बिदअतीवर कायम राहिले. (फत्हुल कदीर)

४) काहीजवळ येथे न्यायाने अभिप्रेत ''लाइलाहा इल्लल्लाह'' म्हणजे तौहीद आहे.

५) इमाम शौकानी ने याचा हा अर्थ सांगितला आहे की, ''आपल्या नमाजीमध्ये आपले तोंड किबल्याकडे करून घ्या. मग तुम्ही कोणत्या पण मशिदीमध्ये असाल.'' आणि इमाम इब्ने कसीरने याच्याने 'इस्तकामत' म्हणजे रसूल ﷺ चे अनुकरण या अर्थाने अभिप्रेत धरले आहे. आणि पुढच्या महावाक्यांत ''इखलास लिल्लाह'' आणि प्रत्येक कर्माच्या मान्यतेसाठी, आवश्यक आहे ते धर्मशास्त्रानुसार असावे. दुसरे फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी असावे. महावाक्यांत या गोष्टींची ताकीद केली गेली आहे.

६) महावाक्यात भूषणाने अभिप्रेत पोषाख आहे. याच्या अवतरण्याला सबब पण, मुश्‌रिकीनच्या नग्न तवाफ करण्याशी संबंधित आहे. म्हणून त्यांना सांगण्यात आले की, पोषाख घालून अल्लाहची उपासना करा; आणि तवाफ करा.

७) इसराफ (मर्यादेच्या बाहेर निघून जाणे.) कोण्या वस्तूंत, इतकेच काय पण, खाण्यापिण्यात सुद्धा नापसंत आहे. एका हदीसमध्ये नबी ﷺ नी फर्माविले ''जे इच्छा ल खा; जे इच्छील ते परिधान करा. परंतु दोन गोष्टी टाळा, उधळपट्टी आणि गर्व'' (स.बुखारी) काही पूर्वी होऊन गेलेल्यांचे म्हणणे आहे, अल्लाहतआलाने ''वकुलु वशरबु वला तुसरिफु.'' या अर्ध्या महावाक्यांत सारी वैद्यकी जमा करून दिली आहे. (इब्ने कसीर)

काही म्हणतात की, जीनत (भूषणा) ने तो पोषाख अभिप्रेत आहे; जो सजण्यासाठी परिधान केला जाईल. ज्याने त्यांच्याजवळ नमाज आणि तवाफच्यावेळी, साज श्रृंगारचा हुकूम निघतो. या महावाक्यांत नमाजीत करण्याला वाजीब असण्याबद्दल आधार घेतला गेला आहे. किंबहुना हदीशीच्या अनुषंगाने गृप्तेंद्रिय लपविणे (गुडघ्यापासून बेंबीपर्यंतच्या भागाला झाकणे) कुठल्याही परिस्थितीत आवश्यक आहे. जरी मनुष्य एकांतातच काअसेना! (फत्हुल कदीर) जुमआ आणि ईदच्या दिवशी सुगंधाचा उपयोगपण चांगला आहे की, हे पण साजश्रृंगाराचा एक हिस्सा आहे. (इब्ने कसीर)

८) मुशरिकांनी ज्याप्रमाणे तवाफच्यावेळी पोषाख परिधान करण्याला नापसंत ठरवून ठेवले होते, अशाचप्रमाणे काही हलाल वस्तूदेखील, अल्लाहचे सामिप्य प्राप्त होण्यासाठी आपल्यावर हराम करून घेतल्या होत्या (जसे की काही सुफी लोक पण असे करतात) तसेच पुष्कळशा हलाल वस्तूआपल्या मूर्तींच्या नावे मुक्त करून देण्याच्या कारणाने हराम करून घेत असत. अल्लाहतआलाने म्हटले, ज्या वस्तू अल्लाहतआलाने लोकांच्या शोभेसाठी (उदा.पोषाख वगैरे) आणि खाण्याच्या उत्तम उत्तम गोष्टी बनविल्या आहेत. त्यांना कोण हराम बनवणार आहे ? अर्थ हा आहे की, लोकांच्या हराम करून घेण्याने, अल्लाहच्या हलाल केलेल्या गोष्टी, हराम होऊन जाणार नाहीत; त्या हलालच राहतील. या हलाल आणि पवित्र वस्तू मुळांत अल्लाहने ईमानवाल्यांसाठीच बनविल्या आहेत; जरी काफिरपण यापासून लाभान्वीत आणि फायदा घेणार होत आहेत. किंबहुना ते कित्येक वेळा, ऐहिक गोष्टी आणि सुखसोयी प्राप्त करून घेण्यात, ते मुसलमानांपेक्षा जास्त यशस्वी दिसतात. परंतु हे क्षणभंगुर आणि तात्कालिक आहे. ज्याच्यात अल्लाहतआलाची निर्माण करण्याची मर्जी आणि चातुर्य आहे. तथापि कयामतच्या दिवशी या देणग्या फक्त ईमानवाल्यांसाठीच असतील. कारण की, ज्याप्रमाणे काफिरांवर स्वर्ग हराम होईल; त्याचप्रमाणे खाण्यापिण्याच्या वस्तूपण हराम होतील.

قُلْ اِنَّمَا حَرَّمَ رَبِّيَ الْفَوَاحِشَ مَا ظَهَرَ مِنْهَا وَمَا بَطَنَ وَالْاِثْمَ وَالْبَغْيَ بِغَيْرِ الْحَقِّ وَاَنْ تُشْرِكُوْا بِاللّٰهِ مَا لَمْ يُنَزِّلْ بِهٖ سُلْطٰنًا وَّاَنْ تَقُوْلُوْا عَلَى اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿٣٣﴾

**आपण सांगून द्या की, तथापि माझ्या पालनकर्त्याने हराम केले आहे, त्या सर्व निर्लज्ज गोष्टींला ज्या उघड[१] आहेत किंवा गुप्त आहेत. आणि प्रत्येक पापाच्या गोष्टीला आणि नाहक कोणावर जुलूम करण्याला[२], आणि या गोष्टीला की तुम्ही अल्लाहबरोबर कोण्या अशा गोष्टीला सरकतदार ठरवावे; ज्याची अल्लाहतआलाने कोणी सनद अवतीर्ण केली नाही; आणि या गोष्टीला की, तुम्ही अल्लाहच्या जिम्मे अशी गोष्ट लावावी जे तुम्ही जाणत नाही ३३**

وَلِكُلِّ اُمَّةٍ اَجَلٌ ۚ فَاِذَا جَآءَ اَجَلُهُمْ لَا يَسْتَاْخِرُوْنَ سَاعَةً وَّلَا يَسْتَقْدِمُوْنَ ﴿٣٤﴾

**आणि प्रत्येक समूहाकरीता एक काळ नियमित आहे[३]. मग ज्यावेळी त्यांचा नियमित काळ येऊन लागेल, त्यावेळी न एक घटका मागे हटू शकतील, न पुढे जाऊ शकतील ३४**

يٰبَنِيْٓ اٰدَمَ اِمَّا يَاْتِيَنَّكُمْ رُسُلٌ مِّنْكُمْ يَقُصُّوْنَ عَلَيْكُمْ اٰيٰتِيْ ۙ فَمَنِ اتَّقٰى وَاَصْلَحَ فَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿٣٥﴾

**हे आदमच्या संतती! जर तुमच्यापाशी पैगंबर आलेत, जे तुमच्यातूनच असतील, जे माझे आदेश तुम्हाला सांगतील, तर जो माणूस ईशभय अंगिकारील, आणि सुधारणा करून घेईल, तर अशा लोकांवर काही दु:ख नाही, आणि ते उदास पण होणार नाहीत[४] ३५**

وَالَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا وَاسْتَكْبَرُوْا عَنْهَآ اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ النَّارِ ۚ هُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٣٦﴾

**आणि जे लोक आमच्या या आदेशांना खोटे म्हणतील, आणि त्याच्यापासून अहंकार करतील, ते लोक नरकाग्नीवाले आहेत; ते त्यांत नेहमी नेहमी राहतील[५] ३६**

१) उघड निर्लज्जपणाच्या गोष्टींनी अभिप्रेत काहींजवळ वेश्यांच्या अड्ड्यांवर जाऊन कुकृत्य आणि गुप्तपणे ने अभिप्रेत कोण्या गर्लफ्रेंन्डशी विशेष संबंध प्रस्तापित करणे आहे. काहींच्या जवळ उघड निर्लज्जपणाने अभिप्रेत महरिमांशी ncest लैंगिक संबध ठेवणे, जे मना आहे. खरी गोष्ट ही आहे की, हे कोण्या एका प्रकाराशी संबंधित खास नाही, परंतु सर्वसाधारण आहे. आणि प्रत्येक प्रकाराच्या उघड निर्लज्जतेला शामील आहे. (जसे फिल्मा,नाटके, टि.व्ही.,व्हि.सी.आर., अश्लील मासिके आणि पत्रिका, नाचगाणी, मुजऱ्यांच्या महफीली, स्त्रियांचे बेपर्दा होणे, आणि पुरूषांबरोबर त्यांचे अहंमन्यतेने मेळमिलाप करणे, मेहन्दी आणि लग्नांच्या चाली रितीत, निर्लज्जतेचे खुले आमप्रदर्शन वगैरे) हे सर्व उघड निर्लज्जपणा ची कामे आहेत. 'अआजनल्लाहु मिनहुमा'

२) 'पाप' अल्लाहच्या आज्ञाभंजनाचे नाव आहे. आणि हदीसमध्ये नबी ﷺ नी सांगितले, ''पाप ते आहे जे तुझ्या अंत:करणाला बोचेल; आणि लोकांवर हे जाहीर होण्याला तू वाईट समजशील.'' (स.मुस्लीम किताबुल बिर्र) काही म्हणतात पाप ते आहे; ज्याचा परिणाम करणाऱ्याच्या व्यक्तीपुरता मर्यादित राहील. आणि 'बगयी' हे आहे की, त्याचे परिणाम दुसऱ्यापर्यंत पण पोहचावे. येथे 'बगयी' च्या बरोबर 'बिगयरिल हक्क' चा अर्थ नाहक जुलूम आणि अत्याचार उदाहरणार्थ लोकांचा हक्क खाऊन टाकणे, कोणाची संपत्ती घेऊन घेणे, अयोग्य मारपीट करणे, आणि शिवीगाळ करून बइज्जती करणे, वगैरे आहे.

३) नियमित काळ ने अभिप्रेत, ती कर्म करण्याची संधी आहे, जी अल्लाहतबारकवतआला प्रत्येक समूहाला परीक्षा घेण्यासाठी देत असतो; की ते त्या संधीचा फायदा उचलून अल्लाहला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करतो, किंवा त्याच्या बंड आणि शिरजोरीत आणखी वाढ होते. ही संधी काही वेळा त्यांच्या संपूर्ण जीवनापर्यंत विस्तृत केली जाते. म्हणजे ऐहिक जीवनांत तो पकड करीत नाही. किंबहुना फक्त परलोकांत तो शिक्षा देईल. त्यांचा निश्चित वेळ, कयामतचा दिवस आहे; आणि ज्यांना या जगांतच शिक्षा देतो, त्यांची निश्चित वेळ ती आहे, जेव्हा तो त्यांच्याकडून उत्तर मागेल.

४) हा त्या ईमानवाल्यांचा सुपरिणाम वर्णन केला गेला आहे; जे ईशभय आणि सुकर्म करणारे असतील. कुरआनाने ईमानाच्या बरोबर बहुतेक ठिकाणी सुकर्मांचा उल्लेख अवश्य केला आहे. ज्याने माहित होते की, अल्लाहजवळ तेच ईमान भरोशालायक आहे ज्याच्या बरोबर सुकर्मपण असेल.

५) याच्यात ईमानवाल्यांच्या उलट त्या लोकांचा वाईटपणाचा परिणाम वर्णन केला आहे, जे अल्लाहच्या आदेशांना खोटे ठरवितात; आणि त्यांच्या मुकाबल्यांत अहंकार करतात. ईमानवाले आणि कुफ्रवाले, दोघांचा परिणाम वर्णन करण्याचा उद्देश्य हा आहे की, लोकांनी त्या कर्तृत्वाला अंगिकारावे, ज्याचा परिणाम चांगला आहे. आणि त्या कर्तृत्वापासून वाचावे ज्याचा परिणाम वाईट आहे.

فَمَنْ أَظْلَمُ مِمَّنِ افْتَرَىٰ عَلَى اللَّهِ كَذِبًا أَوْ كَذَّبَ
بِآيَاتِهِ ۚ أُولَٰئِكَ يَنَالُهُمْ نَصِيبُهُم مِّنَ الْكِتَابِ ۖ حَتَّىٰ
إِذَا جَاءَتْهُمْ رُسُلُنَا يَتَوَفَّوْنَهُمْ قَالُوا أَيْنَ مَا كُنتُمْ
تَدْعُونَ مِن دُونِ اللَّهِ ۖ قَالُوا ضَلُّوا عَنَّا وَشَهِدُوا
عَلَىٰ أَنفُسِهِمْ أَنَّهُمْ كَانُوا كَافِرِينَ ﴿٣٧﴾

**तर त्या माणसापेक्षा जास्त जालीम कोण असेल, जो अल्लाहतआलावर खोटा आळ घेईल आणि त्याच्या निशाण्यास खोटे सांगेल, या लोकांच्या प्रारब्धाचा, जे काही पुस्तकांतून आहे, ते त्यांना मिळून जाईल[१]; येथपावेतो की त्यांच्याजवळ आमचे पाठविलेले देवदूत त्यांचे प्राण हरण करण्यासाठी येतील; तेव्हा विचारतील की ते कुठे गेले, ज्यांची तुम्ही अल्लाहला सोडून (इबादत) उपासना करीत होता? ते म्हणतील की, आम्हापासून (ते) सर्व गायब होऊन गेले; आणि स्वत:च्या विरोधात साक्ष देतील की, ते काफिर आहेत ३७**

قَالَ ادْخُلُوا فِي أُمَمٍ قَدْ خَلَتْ مِن قَبْلِكُم مِّنَ الْجِنِّ
وَالْإِنسِ فِي النَّارِ ۖ كُلَّمَا دَخَلَتْ أُمَّةٌ لَّعَنَتْ أُخْتَهَا ۖ
حَتَّىٰ إِذَا ادَّارَكُوا فِيهَا جَمِيعًا قَالَتْ أُخْرَاهُمْ لِأُولَاهُمْ
رَبَّنَا هَٰؤُلَاءِ أَضَلُّونَا فَآتِهِمْ عَذَابًا ضِعْفًا مِّنَ
النَّارِ ۖ قَالَ لِكُلٍّ ضِعْفٌ وَلَٰكِن لَّا تَعْلَمُونَ ﴿٣٨﴾

**अल्लाहतआला फर्मावील की जे समूह तुमच्यापूर्वी होऊन चुकले आहेत[२], जिन्नांतामधून सुद्धा आणि मानवांमधून सुद्धा, त्यांच्याबरोबर तुम्ही सुद्धा नरकाग्नीत जा. ज्यावेळी कोणी पण समूह नरकाग्नीमध्ये दाखल होईल; आपल्या दुसऱ्या समूहाला शापित करेल[३]. येथ पावेतो की, जेव्हा यांत सर्व जमा होऊन जातील[४], तर मागचे लोक पहिल्या लोकांच्या बाबतीत म्हणतील[५] की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या लोकांनी मार्गभ्रष्ट केले होते; म्हणून तू यांना नरकाग्नीची शिक्षा दुप्पट[६] दे. अल्लाहतआला म्हणेल की, सर्वांनाच दुप्पट आहे[७], परंतु तुम्हास ठाऊक नाही ३८**

وَقَالَتْ أُولَاهُمْ لِأُخْرَاهُمْ فَمَا كَانَ لَكُمْ عَلَيْنَا
مِن فَضْلٍ فَذُوقُوا الْعَذَابَ بِمَا كُنتُمْ تَكْسِبُونَ ﴿٣٩﴾

**आणि पूर्वीचे लोक नंतरच्या लोकांना म्हणतील, मग तुम्हास आमच्यावर कुठल्याही प्रकारची सरशी नाही. म्हणून तुम्ही सुद्धा आपल्या कर्तृत्वाच्या बदल्यात शिक्षेची गोडी चाखा ३९**

१) याचे वेगवेगळे अर्थ सांगण्यात आले आहे. एक अर्थ कर्म,रोजी आणि आयुष्याचे केले गेले आहे. म्हणजे यांच्या नशिबांत जे कर्म आणि रोजी आहे, त्याला पूर्ण करून घेणे आणि जेवढे आयुष्य आहे, तेवढे उपभोगल्यानंतर, सरशेवटी मृत्यू पावतील. याच्या सारख्या अर्थाचे हे महावाक्य आहे, ''जे लोक अल्लाहवर खोटा आळ घेतात, ते यशस्वी होणार नाहीत. जगाचा थोड्या दिवसांचा फायदा उचलून सरशेवटी आमच्याकडेच त्यांना परतून येणे आहे.'' (सू. यूनुस-६९/७०)

२) 'उमम्' उम्मतचे अनेकवचन आहे. अभिप्रेत ते समूह आणि गट आहेत, जे कुफ्र आणि विरोध तसेच शिर्क आणि खोटे म्हणणे यात एकसारखे असतील 'फी' 'मअ' च्या अर्थात पण असू शकतो. म्हणजे तुमच्यापूर्वी मानव आणि जिन्नांचे जे समूह तुमच्यासारखे येथे येऊन चुकले आहेत, त्यांच्या बरोबर नरकाग्नीत दाखल होऊन जा; किंवा त्यांच्यात जाऊन शामील व्हा.

३) 'लअन्त उख्तहा' आपल्या दुसऱ्या समूहाला शाप देतील. 'उख्त' बहिणीला म्हणतात. एका समूहाला दुसऱ्या समूहाची बहीण धर्माच्या अनुषंगाने किंवा मार्गभ्रष्टतेच्या अनुषंगाने म्हटले गेले. म्हणजे दोन्ही सुद्धा एका चुकीच्या धर्माचे अनुयायी किंवा मार्गभ्रष्ट होते किंवा नरकाग्नीचे साथीदार होण्याच्या अनुषंगाने त्यांना (म्हणजे समूहांना) एक दुसऱ्याची बहीण ठरविण्यात आले आहे.

४) 'इद्दारकु' चा अर्थ आहे, 'तदारकु'. जेव्हा एक दुसऱ्याला भेटतील आणि आपसांत एकत्र होतील.

५) 'उखरा' (मागचे) ने अभिप्रेत मागून दाखल होणारे आहेत. आणि 'उला' (पहिले) ने अभिप्रेत त्यांच्यापूर्वी दाखल होणारे आहेत. किंवा 'उखरा' ने 'अत्बाअ' (अनुयायी) आणि 'उला' ने 'मतबुअ' (पुढारी आणि सरदार) अभिप्रेत आहेत. त्यांचा अपराध कारण की, जास्त कठीणआहे, की स्वत:सुद्धा सत्यमार्गापासून दूर राहिले; आणि दुसऱ्यांना पण प्रयत्नपूर्वक, त्यापासून दूर ठेवले; म्हणून हे आपल्या अनुयायांपूर्वी नरकाग्नीत जातील.

६) ज्याप्रमाणे एका दुसऱ्या ठिकाणी सांगितले गेले, नरकाग्नीमध्ये जाणारे म्हणतील, ''हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही तर आमच्या सरदार आणि मोठ्यांच्या मागे लागून राहिलो त्यांनीच आम्हाला सरळ मार्गावरून भटकविले; या अल्लाह ! त्यांना दुप्पट शिक्षा दे. आणि त्यांना मोठा शाप दे (सू. अहजाब - ६७/६८)

७) म्हणजे आता एक दुसऱ्याला टोमणे मारणे,कोसणे आणि एक दुसऱ्यावर आरोप करण्याने काही फायदा नाही. तुम्ही सर्वच आपआपल्या ठिकाणी अपराधी आहात. आणि तुम्ही सर्वच दुप्पट शिक्षेला पात्र आहात. अनुयायी आणि ज्यांचे अनुकरण केले आहे त्यांचा हा वादविवाद, सू.सबा आ. ३१-३२ मध्ये सुद्धा वर्णन केला गेला आहे.

إِنَّ الَّذِينَ كَذَّبُوا بِآيَاتِنَا وَاسْتَكْبَرُوا عَنْهَا لَا تُفَتَّحُ لَهُمْ أَبْوَابُ السَّمَاءِ وَلَا يَدْخُلُونَ الْجَنَّةَ حَتَّىٰ يَلِجَ الْجَمَلُ فِي سَمِّ الْخِيَاطِ ۚ وَكَذَٰلِكَ نَجْزِي الْمُجْرِمِينَ ﴿٤٠﴾

निशसंशय जे लोक आमच्या निशाण्यांना खोटे म्हणतात; आणि त्यांच्याशी अहंकार करतात; त्यांच्यासाठी आकाशाचे दरवाजे उघडले जाणार नाहीत(१); आणि ते लोक कधी स्वर्गात जाणार नाहीत; जोपर्यंत उंट सुईच्या नाक्यातून आत न चालला जाईल(२). आणि आम्ही अपराधी लोकांना अशीच शिक्षा देत असतो ४०

لَهُم مِّن جَهَنَّمَ مِهَادٌ وَمِن فَوْقِهِمْ غَوَاشٍ ۚ وَكَذَٰلِكَ نَجْزِي الظَّالِمِينَ ﴿٤١﴾

याच्या करता नरकाग्नीच्या उष्णतेचे अंथरूण असेल आणि त्यांच्यावरती त्यांचेच(३) पांघरूण असेल; आणि आम्ही अशा जालीमांना अशीच शिक्षा देत असतो ४१

وَالَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ لَا نُكَلِّفُ نَفْسًا إِلَّا وُسْعَهَا أُولَٰئِكَ أَصْحَابُ الْجَنَّةِ ۖ هُمْ فِيهَا خَالِدُونَ ﴿٤٢﴾

आणि ज्या लोकांनी ईमान आणले, आणि त्यांनी चांगली कामे केली, आम्ही कोण्या मनुष्यास, त्यांच्या सामर्थ्यापेक्षा जास्त काम लावत नाही(४). असे लोक स्वर्गवाले आहेत. ते त्यात हमेशा हमेशा राहतील ४२

وَنَزَعْنَا مَا فِي صُدُورِهِم مِّنْ غِلٍّ تَجْرِي مِن تَحْتِهِمُ الْأَنْهَارُ ۖ وَقَالُوا الْحَمْدُ لِلَّهِ الَّذِي هَدَانَا لِهَٰذَا وَمَا كُنَّا لِنَهْتَدِيَ لَوْلَا أَنْ هَدَانَا اللَّهُ ۖ لَقَدْ جَاءَتْ رُسُلُ رَبِّنَا بِالْحَقِّ ۖ وَنُودُوا أَن تِلْكُمُ الْجَنَّةُ أُورِثْتُمُوهَا بِمَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿٤٣﴾

آلثلث

आणि जी काही त्यांच्या मनात (चुरस) असेल, आम्ही तिला दूर करून टाकू(५), त्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात असतील; आणि ते लोक म्हणतील की, अलहम्दो लिल्लाह (सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे) ज्याने आम्हाला या मुक्कामापर्यंत पोहोचविले आणि आमची कधी पोहोच झाली नसती, जर अल्लाहतआलाने आम्हाला पोहोचविले नसते(६). खरोखर आमच्या पालनकर्त्याचे पैगंबर खऱ्या गोष्टी घेऊन आले होते. आणि त्यांना पुकारून सांगितले जाईल की, हा स्वर्ग तुम्हांस देण्यात आला आहे, तुमच्या कर्माच्या बदल्यात(७) ४३

وَنَادَىٰ أَصْحَابُ الْجَنَّةِ أَصْحَابَ النَّارِ أَن قَدْ وَجَدْنَا مَا وَعَدَنَا رَبُّنَا حَقًّا فَهَلْ وَجَدتُّم مَّا وَعَدَ رَبُّكُمْ حَقًّا ۖ قَالُوا نَعَمْ ۚ فَأَذَّنَ مُؤَذِّنٌ بَيْنَهُمْ أَن لَّعْنَةُ اللَّهِ عَلَى الظَّالِمِينَ ﴿٤٤﴾

आणि स्वर्गवाले नरकाग्नीवाल्यांना पुकारून (विचारतील) की, आमच्याशी आमच्या पालनकर्त्याने जो वायदा केला होता, आम्ही तर त्याला वास्तवात पावलो; तर (काय) तुमच्याशी जो तुमच्या पालनकर्त्याने वायदा केला होता, तुम्ही पण त्याला वास्तवात पावला(८)? ते म्हणतील होय; मग एक पुकारणारा दोघांच्या दरम्यान पुकारेल, की जुलमी लोकांवर अल्लाहचा शाप असो! ४४

الَّذِينَ يَصُدُّونَ عَن سَبِيلِ اللَّهِ وَيَبْغُونَهَا عِوَجًا وَهُم بِالْآخِرَةِ كَافِرُونَ ﴿٤٥﴾

وقف لازم

जे अल्लाहच्या मार्गात अडथळा आणित असत; आणि त्यात वाकडेपणा शोधत असत; आणि ते लोक परलोकाला पण नाकारणारे होते ४५

وَبَيْنَهُمَا حِجَابٌ ۚ وَعَلَى الْأَعْرَافِ رِجَالٌ يَعْرِفُونَ كُلًّا بِسِيمَاهُمْ ۚ وَنَادَوْا أَصْحَابَ الْجَنَّةِ أَن سَلَامٌ عَلَيْكُمْ ۚ لَمْ يَدْخُلُوهَا وَهُمْ يَطْمَعُونَ ﴿٤٦﴾

आणि या दोघांच्या दरम्यान एक आड असेल(९). आणि आअराफ वर पुष्कळशी माणसे असतील(१०). ते लोक प्रत्येकाला त्यांच्या मुद्रेवरून ओळखत असतील(११); आणि स्वर्गवाल्यांना मोठ्याने हाक मारून म्हणतील, अस्सलाम अलैकुम! आता (पर्यंत) हे आअराफ वाले, स्वर्गात दाखल झालेले नसतील. पण ते त्याची उमेद बाळगत असतील(१२) ४६

१) याच्याने काहींनी कर्म काहींनी आत्मा आणि काहींनी प्रार्थना अभिप्रेत केली आहे. म्हणजे यांचे कर्म आणि आत्मा किंवा प्रार्थना याकरीता आकाशाचे दरवाजे उघडले जात नाहीत. म्हणजे कर्म आणि दुआ कबूल होत नाही. आणि आत्मा जमिनीत पुन्हा परतवून दिले जातात. (जसे की मुसनद अहमद जिल्द २ पृष्ठ ३६४-३६५ च्या एका हदीसने ठाऊक होते.) इमाम शौकानी म्हणतात की, तिन्ही गोष्टी अभिप्रेत असूशकतात.

२) ज्याप्रमाणे उंटाचे सुईच्या नाकातून जाणे शक्य नाही, अशाचप्रकारे काफिरांचे स्वर्गप्रवेश शक्य नाही. उंटाचे उदाहरण दिले, यासाठी की, उंट अरबात परिचित होता. आणि शारीरिक दृष्ट्या, एक मोठा प्राणी होता. आणि सुईचे नाके (छिद्र) हे आपल्या बारीक आणि संकूचित होण्याच्या अनुषंगाने अनुपम आहे. 'तअ्लिक बील महाल' चा अर्थ आहे, 'अशा वस्तूबरोबर सशर्त करून देणे, जे अशक्य असेल. जसे उंट सुईच्या नाक्यांत दाखल होऊ शकत नाही. आता कोण्या वस्तूच्या वास्तविक होण्याला उंटाच्या नाक्यांत दाखल होण्याबरोबर सशर्त करून देणे, 'तअ्लिक बिल् महाल' आहे.

३) 'गवाश', 'गाशिया' चे अनेकवचन आहे. घेरून घेणारी. म्हणजे आगच त्यांचे पांघरूण होईल; म्हणजे वरून सुद्धा आगीने त्यांना घेरले असेल.
४)याच्याने उद्देश्य हे दाखविणे आहे की, ईमान आणि चांगली कामे, या अशा गोष्टी नाहीत की ज्या माणसाच्या ताकदीपेक्षा जास्त असाव्यात आणि मनुष्य त्यांच्यावर अंमलबजावणी करण्याचे सामर्थ्य बाळगत नसावा. किंबहुना प्रत्येक मनुष्य त्यांना सहजतेने आत्मसात करू शकतो. आणि त्यांना चांगल्या प्रकारे अंमलात आणूशकतो.
५) 'गिल्ल' त्या मत्सर आणि द्वेषाला म्हटले जाते, जो अंत:करणात लपलेला असतो. अल्लाहतआला स्वर्गवाल्यांना हे बक्षीसपात्र देईल की त्यांच्या मनांत, एक दुसऱ्याच्या विरूद्ध द्वेष आणि शत्रुत्वाच्या ज्या भावना असतील, त्या दूर करून टाकीन, मग त्यांची अंत:करणे, एक दुसऱ्यांच्या बाबतीत आरशासारखी स्वच्छ होऊन जातील. कोणाच्या बाबतीत मनांत, गढूळपणा आणि शत्रुत्व राहणार नाही. काहींनी याचा हा अर्थ सांगितला आहे की, स्वर्गवाल्यांच्या दरम्यान दर्जे मध्ये जी तफावत असेल, यावर ते एक दुसऱ्यांचा द्वेष करणार नाहीत. पहिल्या भावार्थाचे समर्थन एका हदीसने होते की, स्वर्गांत जाणाऱ्यांना स्वर्ग आणि नरकाग्नीच्या दरम्यान एका पुलावर थांबवून घेतले जाईल. आणि त्यांच्या दरम्यान आपसांत जी खोट असेल, एक दुसऱ्याला त्यांचा बदला देऊन दिला जाईल. येथपर्यंत की ते बिलकुल पाकसाफ होऊन जातील; तर मग त्यांना स्वर्गांत प्रवेश करण्याची परवानगी देऊन दिली जाईल. (स.बुखारी,किताबुल मजालीम, बाब किसासुल मजालीम) जसे सहाबा कराम ﷺ ची आपसांतील नाराजगी आहे. जी राजकीय विरोधांत त्यांच्या दरम्यान झाली. ह.अली ﷺ चा कौल आहे, ''मला आशा आहे की, मी, उस्मान व तलहा व जुबैर त्या लोकांमधून होतील ज्यांच्या बाबतीत अल्लाहतआलाने फर्माविले आहे, ''आणि जी काही त्यांच्या मनात चुरस असेल, आम्ही तिला दूर करून टाकू.'' (इब्ने कसीर)
६) म्हणजे ही हिदायत ज्यामुळे आम्हास ईमान आणि चांगली कामे करण्याचे जीवन भाग्यांत आले; मग त्यांना अल्लाहच्या दरबारांत मान्यतेचा दर्जापण प्राप्त झाला. ही अल्लाहतआलाची खास दया आहे; आणि त्याची कृपा आहे. जर ही अल्लाहची दया आणि कृपा नसती, तर आम्ही येथपावेतो पोहचू शकलो नसतो. याच भावार्थाची ही हदीस आहे, ज्यांत नबी ﷺ नी फर्माविले, ''ही गोष्ट चांगल्या प्रकारे लक्षात ठेवा, की तुमच्यातून कोणाला त्याचे केवळ कर्म, स्वर्गात घेऊन जाणार नाही, जोपर्यंत अल्लाहतआलाची मेहेरबानी पण होणार नाही.'' सहाबा ﷺ नी विचारले, हे रसूलुल्लाह ! आपण सुद्धा? आपण ﷺ नी म्हटले, हां! मी सुद्धा त्यावेळेपर्यंत स्वर्गात जाणार नाही, जोपर्यंत अल्लाहची दया मला आपल्या पदराखाली घेणार नाही.'' (स.बुखारी, स.मुस्लीम)
७) हा खुलासा मागची गोष्ट आणि चर्चित हदीसच्या विरोधात नाही. यासाठी की, चांगले काम करण्याची सुबुद्धी पण अल्लाहची कृपा आणि उपकार आहे.
८) हीच गोष्ट नबी ﷺ नी, बद्रच्या युद्धात जे काफिर मारले गेले होते, आणि त्यांची प्रेते एका विहीरीत फेकून देण्यात आली होती; त्यांना उद्देशून म्हटली होती. ज्यावर ह.उमर ﷺ नी म्हटले होते, ''आपण अशा लोकांना संबोधित करीत आहांत, जे मरून गेले आहेत.'' आपण ﷺ नी फर्माविले, ''अल्लाहची शपथ मी जे काही त्यांना सांगत आहे, ते तुमच्यापेक्षा जास्त ऐकत आहेत. परंतु आता ते उत्तर देण्याची शक्ती बाळगत नाहीत.' (स. बुखारी व स. मुस्लीम) हा नबी ﷺ चा चमत्कार होता की, अल्लाहतआलाने, आपला आवाज धडा घेण्यासाठी म्हणून मृतांना पण ऐकविला. याच्याने मृतांचा ऐकण्याचा पुरावा होत नाही. कारण चमत्काराने कुठलाही मसला सिद्ध होत नाही. तसेच याच्यापासून दलील घेणे योग्य नाही.
९) 'या दोघांच्या दरम्यान' ने अभिप्रेत, स्वर्ग आणि नरकाग्नीच्या दरम्यान किंवा काफिर आणि ईमानवाल्यांच्या दरम्यान आहे. 'हिजाब' (आड) ने ती भिंत अभिप्रेत आहे जिचा उल्लेख सू.हदीदमध्ये आहे, ''मग त्यांच्या दरम्यान एक भिंत उभी करून दिली जाईल; जिच्यात एक दरवाजा असेल.'' (सू. हदीद-१३) हीच आअराफची भिंत आहे.
१०) हे कोण असतील? यामध्ये भाष्यकारांत (मोठा) खासा मतभेद आहे. बहुतेक भाष्यकारांजवळ हे ते लोक असतील, ज्यांचे पुण्य आणि पाप बरोबर असेल. त्यांचे पुण्य नरकाग्नीत जाण्यास, आणि पाप स्वर्गांत जाण्यास प्रतिबंधक होईल. आणि अल्लाहतआलाकडून शेवटचा पूर्ण निर्णय होईपर्यंत, ते या दरम्यान अधांतरी असतील.
११) 'सीमा' चा अर्थ चिन्हाचा आहे. स्वर्गवाल्यांचे चेहरे तेजपुंज आणि टवटवित आणि नरकाग्नीवाल्यांचे चेहरे काळे आणि डोळे निळे असतील. अशाप्रकारे ते दोन्ही प्रकारच्या लोकांना ओळखून घेतील.
१२) येथे 'यतमअुन' चा अर्थ काही लोकांनी 'यअलमून' चा केला आहे; म्हणजे त्यांना ठाऊक असेल की, ते लवकरच स्वर्गांत दाखल केले जातील.

وَإِذَا صُرِفَتْ أَبْصَارُهُمْ تِلْقَاءَ أَصْحَابِ النَّارِ قَالُوا رَبَّنَا لَا تَجْعَلْنَا مَعَ الْقَوْمِ الظَّالِمِينَ ﴿٤٧﴾

आणि जेव्हा त्यांची दृष्टी नरकाग्नीवाल्यांवर पडेल, तर म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या जालीम लोकांबरोबर शामील करू नकोस ﴿४७﴾

وَنَادَىٰ أَصْحَابُ الْأَعْرَافِ رِجَالًا يَعْرِفُونَهُمْ بِسِيمَاهُمْ قَالُوا مَا أَغْنَىٰ عَنْكُمْ جَمْعُكُمْ وَمَا كُنْتُمْ تَسْتَكْبِرُونَ ﴿٤٨﴾

आणि आअराफवाले, पुष्कळशा माणसांना त्यांच्या मुद्रेवरून ओळखतील, हाक मारून सांगतील तुमचा समाज आणि तुमचे स्वत:ला मोठे समजणे, तुमच्या काही कामा आले नाही[१] ﴿४८﴾

أَهَٰؤُلَاءِ الَّذِينَ أَقْسَمْتُمْ لَا يَنَالُهُمُ اللَّهُ بِرَحْمَةٍ ۚ ادْخُلُوا الْجَنَّةَ لَا خَوْفٌ عَلَيْكُمْ وَلَا أَنْتُمْ تَحْزَنُونَ ﴿٤٩﴾

काय हे तेच (लोक) आहेत, ज्यांच्या बाबतीत तुम्ही शपथा खाऊन खाऊन सांगत असत, की अल्लाहतआला त्यांचेवर[२] मेहेरबानी करणार नाही[२]. त्यांना असा हुकूम होईल की जा स्वर्गांत तुमच्यावर न कुठले भय आहे, न तुम्ही दु:खी व्हाल ﴿४९﴾

وَنَادَىٰ أَصْحَابُ النَّارِ أَصْحَابَ الْجَنَّةِ أَنْ أَفِيضُوا عَلَيْنَا مِنَ الْمَاءِ أَوْ مِمَّا رَزَقَكُمُ اللَّهُ ۚ قَالُوا إِنَّ اللَّهَ حَرَّمَهُمَا عَلَى الْكَافِرِينَ ﴿٥٠﴾

आणि नरकाग्नीवाले, स्वर्गवाल्यांना मोठ्याने हाक मारतील, की आमच्यावर थोडेसे पाणीच तर टाकून द्या; किंवा आणखी काही देऊन टाका; जे अल्लाहने तुम्हांस देऊन ठेवले आहे. स्वर्गवाले म्हणतील की, अल्लाहतआलाने दोन्ही गोष्टीची काफिरांकरीता बंदी केलेली आहे[३] ﴿५०﴾

الَّذِينَ اتَّخَذُوا دِينَهُمْ لَهْوًا وَلَعِبًا وَغَرَّتْهُمُ الْحَيَاةُ الدُّنْيَا ۚ فَالْيَوْمَ نَنْسَاهُمْ كَمَا نَسُوا لِقَاءَ يَوْمِهِمْ هَٰذَا وَمَا كَانُوا بِآيَاتِنَا يَجْحَدُونَ ﴿٥١﴾

ज्यांनी जगामध्ये आपल्या धर्माला खेळ व तमाशा बनवून ठेवले होते; आणि ज्यांना ऐहिक जीवनाने फसवणूकीत टाकून ठेवले होते. तर आम्ही सुद्धा, आजच्या दिवशी त्यांना विसरून जाऊ; जसे की ते या दिवशी भेटण्याला विसरले होते[४]; आणि जसे हे आमच्या महावाक्यांना नाकारत होते ﴿५१﴾

१) हे नरकाग्नीवाले असतील, ज्यांना आअराफवाली माणसे चिन्हांवरून ओळखून घेतील. आणि आपल्या जथ्थ्यावर आणि अहंकारावर जी घमेंड करीत होते, याच्या हवाल्याने त्यांना आठवण करून देतील की, या वस्तू तुमच्या काही कामा आल्या नाहीत.

२) याच्याने अभिप्रेत ते ईमानवाले आहेत; जे जगांत गरीब, कंगाल आणि दरिद्री आणि नादार प्रकारचे होते. ज्यांची टिंगल,थट्टा,चर्चित घमेंडी लोक करीत असत. आणि म्हणत असत की, जर हे अल्लाहचे प्रिय असते, तर त्यांची जगांत अशी स्थिती असती? मग आणखी फुशारकी मारत दावा करीत की, कयामतच्या दिवशीपण अल्लाहची मेहेरबानी आम्हावरच होईल. (जशी जगांत होत आहे.) (आणि) यांच्यावर होणार नाही. काहींनी यासाठी आअराफच्या लोकांना दाखविले आहे. आणि काही म्हणतात की, जेव्हा आअराफचे लोक नरकाग्नीवाल्यांना हे म्हणतील, ''तुमचा जथ्था आणि तुमचे स्वत:ला मोठे समजणे, तुमच्या काही कामा आले नाही.'' तर त्या वेळी अल्लाहकडून स्वर्गवाल्यांकडे इशारा करून सांगितले जाईल की, ''हे तेच लोक आहेत, ज्यांच्या बाबतीत तुम्ही शपथा खात होते की, यांच्यावर अल्लाहची मेहेरबानी होणार नाही.'' (तफसीर इब्ने कसीर)

३) ज्याप्रमाणे पहिले येऊन चुकले आहे, की खाण्यापिण्याच्या देणग्या, कयामतच्या दिवशी फक्त ईमानवाल्यांसाठीच असतील. 'खालिसतन् यौमल कियामा' (सू. आअराफ -३२) या ठिकाणी याचा आणखी खुलासा स्वर्गवासियांच्या तोंडाने करून दिला गेला आहे.

४) हदीसमध्ये येते, कयामतच्या दिवशी अल्लाहतआला, अशा प्रकारच्या सेवकांना म्हणेल, ''काय मी तुला पत्नी मुले दिली नव्हती? तुला मान सन्मान आणि प्रतिष्ठा दिली नव्हती? काय उंट आणि घोडे तुझ्या ताब्यात करून दिले नव्हते ? आणि काय तू सरदारी करताना लोकांकडून कर वसूल करीत नव्हता? तो म्हणेल का नाही? हे अल्लाह! या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. अल्लाहतआला त्याला विचारेल, काय तुला मला भेटण्याचा विश्वास वाटत होता ? तो म्हणेल, नाही.अल्लाहतआला फर्माविल, ''मग ज्याप्रमाणे तू मला विसरून गेला; आज मी तुला विसरून जात आहे.'' (स. मुस्लीम) या महावाक्यावरून हे पण ठाऊक झाले की, धर्माला हंशी खेळ बनवणारे तेच असतात, जे दुनियेच्या फसवणूकीत व्यस्त होतात. अशा लोकांच्या मनांतून कारण की, परलोकाची काळजी आणि अल्लाहचे भय निघून जाते; म्हणून ते धर्मांत सुद्धा, आपल्याकडून जसे इच्छितात, तशी वाढ करून घेतात. आणि धर्माच्या ज्या भागाला इच्छितात, कृतीने त्याला होत्याचे नव्हते करून टाकतात; किंवा त्याला खेळ तमाशाचे स्वरूप देऊन टाकतात. म्हणून धर्मामध्ये आपल्याकडून बिदअात (धर्मांत नव्यागोष्टी) ची वाढ करून त्यांनाच खरे आणि महत्त्व देणे (जशी की बिदअत करणाऱ्यांची पद्धत आहे) हा फार मोठा अपराध, कारण की, याच्याने धर्म खेळ तमाशा बनून राहतो; आणि आदेश आणि फर्ज अनिवार्य गोष्टींवर अंमल करण्याचे महत्त्व संपून जाते.

وَلَقَدْ جِئْنٰهُمْ بِكِتٰبٍ فَصَّلْنٰهُ عَلٰى عِلْمٍ هُدًى وَّرَحْمَةً لِّقَوْمٍ يُّؤْمِنُوْنَ ﴿٥٢﴾

आणि आम्ही त्या लोकांजवळ एक असे पुस्तक पोहचवून दिले आहे, ज्याला आम्ही आमच्या परिपूर्ण ज्ञानाने फार स्पष्ट करून वर्णन केले आहे[१]. ते हिदायत आणि दयेची सबब आहे, त्या लोकांसाठी, ज्यांनी ईमान आणले ५२

هَلْ يَنْظُرُوْنَ اِلَّا تَاْوِيْلَهٗ ؕ يَوْمَ يَاْتِيْ تَاْوِيْلُهٗ يَقُوْلُ الَّذِيْنَ نَسُوْهُ مِنْ قَبْلُ قَدْ جَآءَتْ رُسُلُ رَبِّنَا بِالْحَقِّ ۚ فَهَلْ لَّنَا مِنْ شُفَعَآءَ فَيَشْفَعُوْا لَنَآ اَوْ نُرَدُّ فَنَعْمَلَ غَيْرَ الَّذِيْ كُنَّا نَعْمَلُ ؕ قَدْ خَسِرُوْٓا اَنْفُسَهُمْ وَضَلَّ عَنْهُمْ مَّا كَانُوْا يَفْتَرُوْنَ ﴿٥٣﴾

त्या लोकांना आणखी कोण्या गोष्टीची प्रतीक्षा नाही, फक्त शेवटच्या परिणामाची प्रतीक्षा[२] आहे. ज्या दिवशी याचा शेवटचा परिणाम पुढे येईल, त्या दिवशी जे लोक याला पूर्वीपासून विसरले होते, म्हणतील की, खरोखर आमच्या पालनकर्त्याच्या पैगंबरांनी खऱ्या खऱ्या गोष्टी आणल्या होत्या; तर काय आता आमचा कोणी शिफारसी आहे, की तो आमची शिफारस करून देईल; किंवा काय आम्ही परत पाठविले जाऊ शकतो की, आम्ही लोक, त्या कर्मांच्या ज्यांना आम्ही करीत होतो; त्यांच्या उलट दुसरी कर्मे, करावीत; नि:संशय या लोकांनी आपल्या स्वत:ला तोट्यात टाकून दिले; आणि हे ज्या ज्या गोष्टी करीत होते[३], त्या सर्व नाहीशा झाल्या ५३

اِنَّ رَبَّكُمُ اللّٰهُ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ فِيْ سِتَّةِ اَيَّامٍ ثُمَّ اسْتَوٰى عَلَى الْعَرْشِ ۫ يُغْشِي الَّيْلَ النَّهَارَ يَطْلُبُهٗ حَثِيْثًا ۙ وَّالشَّمْسَ وَالْقَمَرَ وَالنُّجُوْمَ مُسَخَّرٰتٍۭ بِاَمْرِهٖ ؕ اَلَا لَهُ الْخَلْقُ وَالْاَمْرُ ؕ تَبٰرَكَ اللّٰهُ رَبُّ الْعٰلَمِيْنَ ﴿٥٤﴾

नि:संशय तुमचा पालनकर्ता अल्लाहच आहे. ज्याने सर्व आकाशांना आणि पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले[४]. मग महासिंहासनावर विराजमान झाला[५]. तो रात्रीपासून दिवसाला अशाप्रकारे लपवून देतो की, रात्र दिवसाच्या मागे लागलीच चालली येत आहे[६]; आणि सूर्य, चंद्र आणि दुसऱ्या नक्षत्रांना निर्माण केले; अशाप्रकारे की ती सर्व त्याच्या आज्ञांकीत आहे. लक्षात ठेवा अल्लाहसाठीच खास आहे, निर्माता होणे आणि हुकूमशहा होणे; अल्लाह मोठ्या वैशिष्टांनी युक्त सकल जगांचा पालनकर्ता आहे. ५४

اُدْعُوْا رَبَّكُمْ تَضَرُّعًا وَّخُفْيَةً ؕ اِنَّهٗ لَا يُحِبُّ الْمُعْتَدِيْنَ ﴿٥٥﴾

लोकांनो! तुम्ही आपल्या पालनकर्त्याचा व्याकुळतेने आणि चुपचाप धावा करीत जा. खरोखर अल्लाहतआला त्या लोकांना प्रिय ठेवीत नाही; जे मर्यादेचे उल्लंघन करतात ५५

وَلَا تُفْسِدُوْا فِي الْاَرْضِ بَعْدَ اِصْلَاحِهَا وَادْعُوْهُ خَوْفًا وَّطَمَعًا ؕ اِنَّ رَحْمَتَ اللّٰهِ قَرِيْبٌ مِّنَ الْمُحْسِنِيْنَ ﴿٥٦﴾

आणि जगांत त्याची दुरूस्ती झाल्यानंतर फसाद फैलावू नका. आणि तुम्ही अल्लाहची उपासना करा, त्याला भीत भीत आणि आशेचे उम्मीदवार बनून; नि:संशय अल्लाहतआलाची दया सुकृत्य करणाऱ्यांपासून जवळ आहे[७] ५६

وَهُوَ الَّذِيْ يُرْسِلُ الرِّيٰحَ بُشْرًاۢ بَيْنَ يَدَيْ رَحْمَتِهٖ ؕ حَتّٰٓى اِذَآ اَقَلَّتْ سَحَابًا ثِقَالًا سُقْنٰهُ لِبَلَدٍ مَّيِّتٍ فَاَنْزَلْنَا بِهِ الْمَآءَ فَاَخْرَجْنَا بِهٖ مِنْ كُلِّ الثَّمَرٰتِ ؕ كَذٰلِكَ نُخْرِجُ الْمَوْتٰى لَعَلَّكُمْ تَذَكَّرُوْنَ ﴿٥٧﴾

आणि तो असा आहे की, आपल्या दयेच्या पावसापूर्वी, वाऱ्याला पाठवितो की, तो खूष करून देतो[८]. येथपावेतो की, जेव्हा ते वारे जड ढगांना उचलून घेतात[९], तेव्हा आम्ही त्या ढगाला कोण्या कोरड्या जमिनीच्या पृष्ठभागाकडे हाकून घेऊन जातो; मग त्या ढगांतून पाऊस पडतो; मग त्या पाण्यापासून प्रत्येक प्रकारची फळे निर्माण करतो[१०]. अशाच प्रकारे आम्ही मृतांना काढून उभे करून देऊ, कारण की तुम्ही समजावे[११] ५७

१) हे अल्लाहतआलाने नरकवासियांच्या बाबतीत फर्माविले आहे की, आम्ही तर परिपूर्ण ज्ञानाप्रमाणे असे पुस्तक पाठवून दिले होते, ज्याच्यात प्रत्येक गोष्ट स्पष्ट करून सांगून दिली होती. या लोकांनी याच्याने फायदा उचलला नाही; तर हे त्यांचे दुर्दैव आहे. नाही तर ज्या लोकांनी यावर ईमान आणले, ते हिदायत आणि मेहेरबानी उपकृत झाले. जणूआम्ही तर, ''जो पर्यंत आम्ही पैगंबर पाठवून तर्क पूर्ण करून देत नाही, आम्ही शिक्षा करीत नसतो.'' (सू. बनी इसराईल-१५) च्या प्रमाणे व्यवस्था करून दिली होती.

२) 'तावील' चा अर्थ आहे, कोण्या गोष्टीची मूळ हकीकत आणि परिणाम, म्हणजे अल्लाहच्या पुस्तकामार्फत वायदे, तंबी आणि स्वर्ग आणि नरकाग्नी वगैरेचे वर्णनतर करून दिले गेले होते; परंतु हे या जगाच्या परिणाम, आपल्या

डोळ्यांनी पाहण्याच्या प्रतिक्षेत होते, तर आता तो परिणाम त्यांच्यासमोर येऊन पोहचला.
३) म्हणजे हे ज्या परिणामाच्या प्रतिक्षेत होते, त्याच्या समोर येऊन गेल्यानंतर सत्याला कबूल करणे किंवा दुसऱ्यांदा जगांत पाठवण्याची आकांक्षा आणि शिफारसकर्त्याचा शोध हे सर्व निरर्थक होतील. ते उपास्यपण त्यांच्यापासून गायब होऊन जातील, ज्यांची ते अल्लाहला सोडून उपासना करीत असत. ते त्यांची मदद करूशकणार नाही, न शिफारस, न नरकाग्नीच्या शिक्षेपासून सोडवूशकतील.
४) हे सहा दिवस रविवार,सोमवार,मंगळवार,बुधवार,गुरूवार आणि शुक्रवार आहेत. शुक्रवारच्या दिवशीच ह.आदम عليه السلام ची निर्मिती झाली. शनिवारच्या दिवशी म्हणतात की, काही निर्मिती झाली नाही. म्हणून याला, यौमुल सब्त म्हटले जाते. कारण की, 'सब्त' चा अर्थ खंडीत करण्याचा आहे. म्हणजे या दिवशी निर्मितीचे काम खंडीत (बंद) झाले. मग या दिवसाने काय अभिप्रेत आहे? आमच्या जगाचा दिवस, जो सूर्योदयापासून सुरू होतो, आणि सूर्यास्तानंतर संपून जातो. किंवा हा दिवस हजार वर्षांच्या बरोबर आहे? ज्याप्रमाणे अल्लाहच्या येथील दिवसाची मोजणी आहे. किंवा ज्याप्रमाणे कयामतच्या दिवसाच्या बाबतीत येते. उघडरीत्या ही दुसरी गोष्ट, जास्त बरोबर वाटते. कारण की, एक तर त्यावेळी सूर्य आणि चंद्राची व्यवस्थाच नव्हती आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीनंतरच ही व्यवस्था अस्तित्वांत आली. दुसरे ही आकाशी जगताची घटना आहे. ज्याचा या जगाशी काही संबंध नाही. म्हणून या दिवसाची खरी हकीकत, अल्लाहतआलाच उत्तम जाणतो. आम्ही निश्चितपणे कोणी गोष्ट सांगू शकत नाही. याशिवाय अल्लाहतआला जर शब्द 'कुन' ने सर्व काही निर्माण करूशकत होता. असे असून सुद्धा त्याने, प्रत्येक वस्तुला वेगवेगळ्या हळू हळू बनविले. याचे ही खरे प्रयोजन अल्लाहतआला जाणतो. तथापि काही धर्मपंडितांनी याचे एक प्रयोजन लोकांना आरामाने, गांभिर्याने आणि आहिस्ता आहिस्ता काम करण्याचा धडा देणे दाखविले आहे. वल्लाह अअलम्!
५) 'इस्तेवा' चा अर्थ उंची आणि कायम होणेचे आहेत. आणि पूर्वीच्या बुजूर्ग लोकांनी का व कसे शिवाय आणि तुलनेशिवाय हेच अर्थ गृहीत धरले आहेत. म्हणजे अल्लाहतआला अर्षवर उंच आणि स्थिर आहे; परंतु कशाप्रकारे, कोणत्या स्थितीत, याला आम्ही वर्णन करूशकत नाही; तसेच कोणाबरोबर उपमा देऊ शकत नाही. नआीम बिन हम्मादचे म्हणणे आहे,''जो अल्लाहच्या सृष्टीबरोबर उपमा देईल, त्याने पण कुफ्र केले. आणि ज्या अल्लाहने आपल्या बाबतीत वर्णन केलेल्या, कोण्या गोष्टीला नाकारले, त्यानेपण 'कुफ्र' केले.'' आणि अल्लाहच्या बाबतीत, त्याची किंवा त्याच्या पैगंबराची वर्णन केलेल्या गोष्टीला वर्णन करणे, उपमा (किंवा तुलना) नाही. म्हणून ज्या गोष्टी, अल्लाहतआलाच्या बाबतीत, कुरआनाच्या स्पष्ट अर्थाच्या महावाक्याने (नस्सने) सिद्ध आहेत त्यांच्यावर मूळ हकीकतीच्या जाणल्याशिवाय, का कसे शिवाय, आणि उपमा दिल्याशिवाय, ईमान ठेवणे आवश्यक आहे. (इब्ने कसीर)
६) 'हसिसन' चा अर्थ आहे फारच जलद्. आणि अर्थ आहे की, एकानंतर दुसरा लगेच येऊन जातो; म्हणजे दिवसाचा प्रकाश येतो तर रात्रीचा अंध:कार लगेच नाहीसा होऊन जातो; आणि रात्र येते तर दिवसाचा उजेड संपून जातो. आणि सर्वींकडे काळोख पसरून जातो.
(७) या महावाक्यांमध्ये चार गोष्टींचे शिक्षण देण्यात आले आहे.

१) अल्लाहतआलाशी खेद व्यक्त करणे आणि रडणे आणि गुपचुपपणे दुआ केली जावी. ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते ''लोकांनो! आपल्या जिवाशी नरमी करा (म्हणजे आवाज कमी करा.) तुम्ही ज्याला हाक मारत आहात तो न बहिरा आहे न गायब. (आहे) तो तुमच्या दुआ ऐकणारा आणि जवळ आहे.'' (स.बुखारी व स. मुस्लीम) २) दुआमध्ये अति न केले जावे म्हणजे आपला आवाका आणि दर्जापेक्षा जास्त दुआ केली जाऊ नये ३) सुधारणा झाल्यानंतर फसाद न केला जावा; म्हणजे अल्लाहचा आज्ञाभंग करून, फसाद फैलाविण्यात भाग न घेतला जावा ४) त्याच्या शिक्षेचे भयपण मनांत असावे आणि त्याच्या दयेची आशापण (असावी.) अशाप्रकारे दुआ करणारे मुहसिनीन आहेत. नक्कीच अल्लाहची दया त्यांच्या जवळ आहे.

८) आपल्या उपास्यत्व आणि पालकत्वाच्या पुराव्यात, अल्लाहतआला आणखी प्रमाणे वर्णन करून मग याच्याने मृतांना जिवंत करण्याचा पुरावा सादर करीत आहे. 'बुशरन्' 'बशीर' चे अनेकवचन आहे. दयेने अभिप्रेत येथे पाऊस आहे. म्हणजे पावसापूर्वी तो गार वारे पाठवितो; जी पावसाची खुषखबर असते.
९) जड ढगांनी अभिप्रेत पाण्याने भरलेले ढग.
१०) प्रत्येक प्रकारची फळे, जी रंगात, चवीत, वासांत आणि स्वरूपात एक दुसऱ्यापासून वेगळी असतात.
११) ज्याप्रमाणे आम्ही पाण्याच्या द्वारे मृत जमिनीमध्ये नव अंकुर निर्माण करून देतो. आणि ती तऱ्हेतऱ्हेचे धान्य आणि फळे निर्माण करते. अशाचप्रकारे कयामतच्या दिवशी सर्व मानवांना जे मातीत मिळून माती होऊन चुकले असतील, आम्ही दुसऱ्यांदा जिवंत करू मग त्यांचा हिशेब घेऊ.

وَالْبَلَدُ الطَّيِّبُ يَخْرُجُ نَبَاتُهٗ بِاِذْنِ رَبِّهٖ ۚ وَالَّذِیْ خَبُثَ لَا یَخْرُجُ اِلَّا نَكِدًا ؕ كَذٰلِكَ نُصَرِّفُ الْاٰیٰتِ لِقَوْمٍ یَّشْكُرُوْنَ ﴿۵۸﴾

**आणि जी सुपिक जमिन असते, तिचे पीक अल्लाहच्या हुकूमाने खूपच येते; आणि जी निकृष्ट आहे, तिचे पिक फारच कमी निघते(१). अशाच प्रकारे आम्ही निशाण्यांना निरनिराळ्या प्रकारे वर्णन करीत असतो; त्या लोकांकरीता जे कृतज्ञता बाळगतात ५८**

لَقَدْ اَرْسَلْنَا نُوْحًا اِلٰی قَوْمِهٖ فَقَالَ یٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ اِلٰهٍ غَیْرُهٗ ؕ اِنِّیْۤ اَخَافُ عَلَیْكُمْ عَذَابَ یَوْمٍ عَظِیْمٍ ﴿۵۹﴾

**आम्ही नूहला त्यांच्या लोकांकडे पाठविले; मग त्यांनी सांगितले की हे माझ्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची उपासना करा. त्याच्याशिवाय तुमचा कोणी उपास्य होण्यास योग्य नाही. मला तर तुमच्या बाबतीत एका मोठ्या दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते ५९**

قَالَ الْمَلَاُ مِنْ قَوْمِهٖۤ اِنَّا لَنَرٰىكَ فِیْ ضَلٰلٍ مُّبِیْنٍ ﴿۶۰﴾

**त्यांच्या लोकांच्या प्रतिष्ठीत लोकांनी सांगितले की, आम्ही तर तुम्हाला खुल्या भ्रमांत पडलेले पाहत आहोत(२) ६०**

قَالَ یٰقَوْمِ لَیْسَ بِیْ ضَلٰلَةٌ وَّ لٰكِنِّیْ رَسُوْلٌ مِّنْ رَّبِّ الْعٰلَمِیْنَ ﴿۶۱﴾

**त्यांनी सांगितले की हे माझ्या लोकांनो! माझ्यात तर जरा पण भ्रम नाही. परंतु मी सकल जगांच्या पालनकर्त्यांचा पैगंबर आहे ६१**

اُبَلِّغُكُمْ رِسٰلٰتِ رَبِّیْ وَ اَنْصَحُ لَكُمْ وَ اَعْلَمُ مِنَ اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿۶۲﴾

**तुम्हास आपल्या पालनकर्त्याचे संदेश पोहचवीत आहे; आणि तुमचे भले इच्छितो; आणि मी अल्लाहकडून अशा गोष्टी जाणतो, ज्या तुम्ही जाणत नाही ६२**

اَوَ عَجِبْتُمْ اَنْ جَآءَكُمْ ذِكْرٌ مِّنْ رَّبِّكُمْ عَلٰی رَجُلٍ مِّنْكُمْ لِیُنْذِرَكُمْ وَ لِتَتَّقُوْا وَ لَعَلَّكُمْ تُرْحَمُوْنَ ﴿۶۳﴾

**आणि काय तुम्हास या गोष्टीचे आश्चर्य वाटते की, तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याजवळ अशा मनुष्याच्या मार्फत जो तुमच्याच पैकी आहे; कोणी उपदेशाची गोष्ट येऊन पोहोचली; कारण की माणसाने तुम्हाला भिववावे, की तुम्ही भिवून जावे (३) कारण की तुमच्यावर दया केली जावी. ६३**

فَكَذَّبُوْهُ فَاَنْجَیْنٰهُ وَ الَّذِیْنَ مَعَهٗ فِی الْفُلْكِ وَ اَغْرَقْنَا الَّذِیْنَ كَذَّبُوْا بِاٰیٰتِنَا ؕ اِنَّهُمْ كَانُوْا قَوْمًا عَمِیْنَ ﴿۶۴﴾

**तर ते लोक त्याला नाकारतच राहिले, तर आम्ही नूहला आणि त्यांना जे त्यांच्या बरोबर नावेत होते. वाचवून घेतले; आणि ज्यांनी आमच्या निशाण्यांना खोटे ठरवले होते, त्यांना आम्ही बुडवून टाकले; नि:संशय ते लोक आंधळे होत होते(४) ६४**

وَ اِلٰی عَادٍ اَخَاهُمْ هُوْدًا ؕ قَالَ یٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ اِلٰهٍ غَیْرُهٗ ؕ اَفَلَا تَتَّقُوْنَ ﴿۶۵﴾

**आणि आम्ही 'आद' च्या लोकांकडे त्याचा भाऊ हूद यास पाठविले(५), त्यांनी सांगितले हे माझ्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची उपासना करा; त्याच्याशिवाय तुमचा कोणी उपास्य नाही. तर काय तुम्ही भीत नाही? ६५**

قَالَ الْمَلَاُ الَّذِیْنَ كَفَرُوْا مِنْ قَوْمِهٖۤ اِنَّا لَنَرٰىكَ فِیْ سَفَاهَةٍ وَّ اِنَّا لَنَظُنُّكَ مِنَ الْكٰذِبِیْنَ ﴿۶۶﴾

**त्यांच्या लोकांत जे प्रतिष्ठीत लोक काफिर होते, त्यांनी म्हटले आम्ही तर तुला मूर्ख समजतो(६). आणि आम्ही तुला नि:संशय लबाड लोकांमधून समजतो ६६**

قَالَ یٰقَوْمِ لَیْسَ بِیْ سَفَاهَةٌ وَّ لٰكِنِّیْ رَسُوْلٌ مِّنْ رَّبِّ الْعٰلَمِیْنَ ﴿۶۷﴾

**त्यांनी सांगितले की हे माझ्या लोकांनो! माझ्यात जरा पण मूर्खता नाही; परंतु मी सकल जगाच्या पालनकर्त्याचा पाठविलेला पैगंबर आहे ६७**

اُبَلِّغُكُمْ رِسٰلٰتِ رَبِّیْ وَ اَنَا لَكُمْ نَاصِحٌ اَمِیْنٌ ﴿۶۸﴾

**तुम्हांस आपल्या पालनकर्त्यांचे संदेश पोहचवित आहे. आणि मी तुमचा खरा खरा हितचिंतक आहे ६८**

१) याच्याशिवाय ही उपमा पण दिली जाऊ शकते, अलबलदुत्तय्यब ने अभिप्रेत बुद्धीमान आणि अलबलदुल खबीस ने मठ्ठ, उपदेश मान्य करणारे अंत:करण आणि याच्या उलट अंत:करण, ईमानवाल्यांचे हृदय आणि दांभिकांचे हृदय, किंवा पवित्र मनुष्य किंवा अपवित्र मनुष्य, ईमानवाला पवित्र मनुष्य आणि उपदेश मान्य करणारे अंत:करण पावसाला

कबूल करणाऱ्या जमिनीसारखे अल्लाहच्या महावाक्यांना ऐकून ईमान आणि चांगली कामे करण्यांत आणखी पक्के होते. आणि दुसरे अंत:करण याच्या उलट खडकाळ जमिनीसारखे आहे जे पावसाचे पाणी कबूलच करत नाही. किंवा केले तरी नावापुरते ज्याने उत्पन्नपण निकामी किंवा नावापुरती होते. यालाच एका हदीसमध्ये असे वर्णन करण्यांत आले आहे; रसूल ﷺ नी सांगितले की, ''मला अल्लाहतआला ने, जे ज्ञान आणि मार्गदर्शन देऊन पाठविले आहे; त्याची उपमा त्या मुसळधार पावसासारखी आहे, जो जमिनीवर पडला. तिचे जे भाग सुपिक होते, त्यांनी पाण्याला आपल्या आत शोषून चारा आणि गवत खूप उगविले (म्हणजे भरपूर उत्पादन दिले.) आणि हिचे काही भाग खडकाळ होते, ज्यांनी पाण्याला रोकून घेतले (आंत शोषले गेले नाही.) तथापि याच्याने सुद्धा लोकांनी फायदा उचलला; स्वत:पण प्याले, शेतीलाही पाजले; आणि शेती केली. आणि जमिनीचा काही भाग बिलकुल कठीण मैदान होते; ज्याने पाणी रोकले नाही आणि काही उगवले सुद्धा नाही. तर हे त्या माणसाचे उदाहरण आहे, ज्याने अल्लाहच्या धर्मात बुद्धीने काम घेतले; आणि अल्लाहने मला ज्या गोष्टीसह पाठविले, त्यापासून त्याने फायदा उचलला. मग स्वत:ही ज्ञान मिळविले, आणि दुसऱ्यांनापण शिकविले; आणि उपमा त्या माणसाची पण आहे, ज्याने काही शिकले नाही. आणि ती हिदायत पण कबूल केली नाही, जिच्याबरोबर मला पाठविले गेले.'' (स.बुखारी)

२) 'शिर्क' अशाप्रकारे माणसाला बुद्धीभ्रष्ट करून टाकते की माणसाला मार्गदर्शन मार्गभ्रष्टता आणि मार्गभ्रष्टता मार्गदर्शन वाटते. जसे नूह عليه السلام च्या लोकांची हीच मन:स्थिती झाली. त्यांना ह.नूह عليه السلام जे अल्लाहच्या एकेश्वरवादाकडे आपल्या लोकांना आमंत्रण देत होते; नाऊजो बिल्लाह ! मार्गभ्रष्ट वाटत होते.

३) ह.नूह عليه السلام आणि ह.आदम عليه السلام च्या दरम्यान दहा शतकांचे किंवा दहा पिढ्यांचे अंतर आहे. ह.नूह عليه السلام च्या काही पूर्वीपर्यंत सर्व लोक इस्लामवर कायम चालत आले होते. मग सर्वांत प्रथम एकेश्वरवादांतून फिरून जाणे, अशाप्रकारे आले की, समाजाचे सदाचरणी लोक मृत्यू पावले, तर त्यांच्यावर श्रद्धा असणाऱ्यांनी, त्यांच्यावर नमन करण्याच्या जागा (उपासना गुहे) कायम केलीत; आणि त्यांची चित्रेपण तेथे टांगून दिलीत. उद्देश त्यांचा असा होता की, अशाप्रकारे त्यांच्या आठवणीने ते पण अल्लाहचे स्मरण करतील. आणि अल्लाहच्या स्मरणात त्यांच्या सारखेच होतील. मग जेव्हा काही काळ लोटला, तेव्हा त्यांनी त्या चित्रांचे पुतळे बनवून दिले. आणि मग आणखी काही काळ लोटल्यानंतर हे पुतळे मूर्तींचे स्वरूप धारण करून गेले. आणि त्यांची पुजा पाठ सुरू झाली. आणि नूह عليه السلام च्या लोकांचे हे सदाचरणी लोक, वद्द सुवाआ, यऊक, यगूस आणि नस्र बनून गेले. अशा परिस्थितीत अल्लाहतआलाने ह.नूह. عليه السلام ला त्यांच्यात पैगंबर बनवून पाठविले. ज्यांनी साडेनऊशे वर्षे धर्म प्रचार केला. परंतु थोड्याशा लोकांच्या शिवाय, सर्वांनी त्यांच्या प्रचाराचा परिणाम मान्य केला नाही. सरशेवटी ईमानवाल्यांशिवाय, सर्वांना बुडवून टाकण्यांत आले. या महावाक्यांत दाखविण्यात येत आहे की, नूह عليه السلام च्या लोकांनी या गोष्टीवर आश्चर्य व्यक्त केले की, याच्यातूनच एक मनुष्य पैगंबर बनून आला, जो त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून भिववित आहे ? म्हणजे याच्या विचारात पैगंबरीसाठी मानव योग्य नाही.

४) म्हणजे सत्त्याने नसत्त्याला पाहत होते, न त्याला आत्मसात करायला तयार होते.

५) हे आदचे लोक पूर्वीचे आद आहेत. ज्यांचे वस्तीस्थान यमनमध्ये खडकाळ डोंगरात होते. आणि आपल्या शक्ती आणि सामर्थ्यात अजोड होते. यांच्याकडे ह.हूद عليه السلام जे याच लोकांपैकी एक होते. पैगंबर बनून आले.

६) ही मूर्खता त्यांच्याजवळ ही होती की, मूर्तींना सोडून ज्यांची उपासना त्यांच्या वाडवडीलांपासून होत आली होती; एका उपास्याच्या उपासनेकडे आमंत्रण दिले जात आहे.

اَوَعَجِبْتُمْ اَنْ جَآءَكُمْ ذِكْرٌ مِّنْ رَّبِّكُمْ عَلٰى رَجُلٍ مِّنْكُمْ لِيُنْذِرَكُمْ ؕ وَاذْكُرُوْٓا اِذْ جَعَلَكُمْ خُلَفَآءَ مِنْۢ بَعْدِ قَوْمِ نُوْحٍ وَّ زَادَكُمْ فِى الْخَلْقِ بَصْۜطَةً ۚ فَاذْكُرُوْٓا اٰلَآءَ اللّٰهِ لَعَلَّكُمْ تُفْلِحُوْنَ ﴿٦٩﴾

**आणि काय तुम्ही या गोष्टीचे आश्चर्य करता की, तुमच्या पालनकर्त्याकडून, तुमच्याजवळ एका अशा माणसाच्या मार्फत, तो तुमच्याचपैकी आहे, कोणी उपदेशाची गोष्ट आली, कारण की त्या माणसाने तुम्हांस भिववावे; आणि तुम्ही ही स्थिती आठवण करा की, अल्लाहने तुम्हांस नूह (अ.) च्या कौमच्या नंतर वारसदार बनविले. आणि शरीराच्या डीलडौलमध्ये तुम्हास जास्त[१] दिले; तर अल्लाहच्या देणग्यांचे स्मरण करा. की कदाचित् तुम्ही सफल व्हाल ⑥९**

قَالُوْٓا اَجِئْتَنَا لِنَعْبُدَ اللّٰهَ وَحْدَهٗ وَنَذَرَ مَا كَانَ يَعْبُدُ اٰبَآؤُنَا ۚ فَاْتِنَا بِمَا تَعِدُنَآ اِنْ كُنْتَ مِنَ الصّٰدِقِيْنَ ﴿٧٠﴾

**त्यांनी म्हटले, काय तूआमच्याजवळ याकरीता आला आहेस की, आम्ही फक्त अल्लाहचीच उपासना करावी; आणि ज्यांची आमचे वाडवडील पुजा करीत होते, आम्ही त्यांना सोडून द्यावे[२]? बस, आम्हाला ज्या शिक्षेची धमकी देत आहांत, तिला आमच्यावर आणा; जर तुम्ही खरे आहात[३] ⑦०**

१) एका दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने याच्या बाबतीत फर्माविले, ''याच्या सारखे शक्तीवाले लोक निर्माण केले गेले नाहीत.'' (सू. अलफज्र-८) आपल्या या शक्तीच्या घमेंडीत व्यस्त होऊन, त्यांनी म्हटले, ''आमच्यापेक्षा जास्त शक्तीमान कोण आहे ?'' अल्लाहतआलाने म्हटले, ''ज्याने त्यांना निर्माण केले आहे. तो यांच्यापेक्षा जास्त शक्तीमान आहे.'' (सू. हा मीम सजदा-१५)

२) वाडवडीलांचे अनुकरण (तकलिद) प्रत्येक काळांत मार्गभ्रष्ट होण्याचा पाया राहिला आहे. आदच्या लोकांनी पण हेच प्रमाण पुढे केले. आणि शिर्कला सोडून एकेश्वरवादाचा मार्ग हाताळण्याला तयार झाले नाहीत. दुर्दैवाने मुसलमानांत सुद्धा आपल्या मोठ्यांच्या अनुकरणाचा हा रोग सर्वसाधारण आहे. त्यांचा एक वर्ग तर तो आहे, जो धर्माची काही समज बाळगतो. आणि धार्मिक ज्ञानांत पण त्याला एका मर्यादेपर्यंत पोहोच आहे; परंतु त्याने आपल्या स्वत:ला कोणी न कोणी खास 'फिकह' आणि नक्की केलेल्या इमामाच्या रायचा पाबंद करून ठेवले आहे. आणि या 'तकलीद' ला आपल्याकडून 'वाजिब' चा दर्जा दिलेला आहे. वास्तविक हा धर्मशास्त्राचा हुकूमच नाही की तो 'वाजिब' व्हावा. या 'तकलीद' ने या 'मुकल्लिदीन' ला मौल्यवान हदीशीवर अंमल करण्यापासून रोकून ठेवले आहे. कारण की या सुन्नती त्यांच्या 'फिकह' मध्ये दाखल नाहीत; किंवा त्यांच्या इमामांनी त्यांना काही महत्त्व दिले नाही. एक दुसरा वर्ग तो आहे, जो धार्मिक समज आणि धार्मिक ज्ञानापासून अपरिचित आहे. याचा तर धर्मच चालीरितींची पुजा आहे. जसे की हा वर्ग, लग्न असो किंवा मरण, प्रत्येक प्रसंगी अज्ञानमुलक रीतीरिवाजांचे पालन करतो. आणि बिदआतवर अंमल करण्याला,'फर्ज' आणि सुन्नत पेक्षा ही जास्त महत्त्व देतो. यांच्याकडे 'फर्ज' ला सोडून देणे सर्व साधारण आहे. परंतु बिदअत आणि चालीरितींचे काटेकोर पालन आहे. यांचे प्रमाण पण हेच आहे की, हे काम आमचे 'मोठे' करत आलेले आहेत. ''जरी यांचे वाडवडील बुद्धीशून्य, आणि हिदायत पासून वंचित होते.'' (सू. बकर:-१७)परंतु तरी सुद्धा वाडवडीलांची चाल सोडणार नाही.

३) ज्याप्रमाणे कुरैशने पण रसूल ﷺ च्या एकेश्वरवादाच्या आमंत्रणाच्या उत्तरात सांगितले होते, ''हे अल्लाह ! जर हे खरे आहे तुझ्याकडून तर आमच्यावर आकाशांतून दगडांचा वर्षाव कर; किंवा कोणी आणखी वेदनादायक शिक्षा आमच्यावर पाठवून दे.'' (सू. अन्फाल-३२) म्हणजे शिर्क करता करता मुशरिकची मतीपण मारली जाते. वास्तविक बुध्दित्तेची मागणी ही होती की, हे म्हटले जाते, ''या अल्लाह जर हे खरे आहे आणि तुझ्याकडून आहे, तर आम्हांस याच्या मान्य करण्याची सुबुद्धी दे. तथापि आदच्या लोकांनी आपले पैगंबर ह. हूद عليه السلام ला सांगून दिले की, जर तू खरा आहेस, तर आपल्या अल्लाहला सांगून ज्या शिक्षेपासून तू भिववीत आहेस, ती पाठवून दे.

قَالَ قَدْ وَقَعَ عَلَيْكُم مِّن رَّبِّكُمْ رِجْسٌ وَغَضَبٌ ۖ أَتُجَادِلُونَنِي فِي أَسْمَاءٍ سَمَّيْتُمُوهَا أَنتُمْ وَآبَاؤُكُم مَّا نَزَّلَ اللَّهُ بِهَا مِن سُلْطَانٍ ۚ فَانتَظِرُوا إِنِّي مَعَكُم مِّنَ الْمُنتَظِرِينَ ﴿٧١﴾

**त्यांनी सांगितले की, बस आता तुमच्यावर अल्लाहच्याकडून शिक्षा आणि[१] प्रकोप येण्याच्या तयारीतच आहे. काय तुम्ही माझ्याशी अशा नावाच्या बाबतीत झगडतात[२], ज्यांना तुम्ही आणि तुमच्या वाडवडीलांनी ठरवून दिले आहे. त्यांना उपास्य होण्याचे कुठलेही प्रमाण, अल्लाहने पाठविले नाही. म्हणून तुम्ही प्रतिक्षेत रहा, मी पण तुमच्याबरोबर प्रतीक्षा करीत आहे** (७१)

فَأَنجَيْنَاهُ وَالَّذِينَ مَعَهُ بِرَحْمَةٍ مِّنَّا وَقَطَعْنَا دَابِرَ الَّذِينَ كَذَّبُوا بِآيَاتِنَا ۖ وَمَا كَانُوا مُؤْمِنِينَ ﴿٧٢﴾

**तर आम्ही त्यांना आणि त्यांच्या साथीदारांना आपल्या दयेने वाचवून घेतले; आणि त्या लोकांची मूळे उखडून फेकली, ज्यांनी आमच्या निशाण्यांस खोटे म्हटले होते. आणि ते ईमान आणणारे नव्हते[३].** (७२)

وَإِلَىٰ ثَمُودَ أَخَاهُمْ صَالِحًا ۗ قَالَ يَا قَوْمِ اعْبُدُوا اللَّهَ مَا لَكُم مِّنْ إِلَٰهٍ غَيْرُهُ ۖ قَدْ جَاءَتْكُم بَيِّنَةٌ مِّن رَّبِّكُمْ ۖ هَٰذِهِ نَاقَةُ اللَّهِ لَكُمْ آيَةً ۖ فَذَرُوهَا تَأْكُلْ فِي أَرْضِ اللَّهِ ۖ وَلَا تَمَسُّوهَا بِسُوءٍ فَيَأْخُذَكُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿٧٣﴾

**आणि आम्ही 'समूद' कडे त्यांचा भाऊ 'सॉलेह' ला पाठविले[४]. त्यांनी सांगितले हे माझ्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची उपासना करा. त्याच्याशिवाय तुमचा कोणी (अन्य) उपास्य नाही. तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याकडून एक स्पष्ट प्रमाण येऊन चुकले आहे. ही अल्लाहची उंटणी आहे, जी तुमच्यासाठी प्रमाण आहे. तर तिला सोडून द्या की अल्लाहच्या जमिनीत तिने चरत फिरावे; आणि तिला वाईट इराद्याने हात पण लावू नका; की कोठे तुम्हास वेदनादायक शिक्षा येऊन पोहचेल** (७३)

१) 'रिजसुन' चा अर्थ तर घाणीचा आहे, ज्याचा अर्थ शिक्षेचा आहे किंवा मग 'रिजसून' येथे नाराजी रागाच्या अर्थात आहे. (इब्ने कसीर)

२) याच्याने अभिप्रेत ती नावे आहेत, जी त्यांनी आपल्या उपास्यांची ठेवली होती. उदाहरणार्थ सदा, समूद, हबाअ वगैरे. जसे नूह عليه السلام च्या लोकांच्या पाच मूर्त्या होत्या, ज्यांच्या नावांचा अल्लाहने कुरआनात उल्लेख केला आहे. जसे अरबच्या मुशरिकांच्या मूर्तींची नांवे होती, लात, उज्जा, मनात, हुबल वगैरे, किंवा आज कालच्या शिर्कच्या श्रद्धा आणि कर्मामध्ये लिप्त लोकांनी नावे ठेवलेली आहेत. उदाहरणार्थ 'दाता,गंजबक्ष, ख्वाजा गरीब नवाज,' 'बाबा फरीद शकर गंज' 'मुश्कील कुशा' वगैरे. ज्यांचे उपास्य किंवा संकट निवारक गंजबक्ष वगैरे, होण्याचे कोणतेही प्रमाण त्या लोकांजवळ नाही.

३) या लोकांवर चक्रीवादळाची शिक्षा आली; जी सात रात्री आणि आठ दिवस सतत चालू राहिली. ज्याने प्रत्येक वस्तुला तबाह आणि बर्बाद करून टाकले. आणि हे 'आदि' ज्यांना आपल्या शक्तीवर फार गर्व होता, त्यांची प्रेते, खजुरीच्या कापलेल्या खोडांसारखी जमिनीवर पडलेली दिसत होती. पहा सू.अल्हाक्का आ.६-८, सू.हूद आ.५३-५६, सू.अहकाफ आ.२४-२५ वगैरे.

४) हे समूद हिजाज आणि सीरियाच्या दरम्यान कुराच्या खोऱ्यात रहात असत. ९ हिजरीमध्ये तबूकला जातांना रसूल ﷺ आणि सहाबा رضي الله عنهم जे त्यांच्या राहण्याच्या जागेतून आणि खोऱ्यातून जाणे झाले. ज्यावर आपण ﷺ नी सहाबांना सांगितले की, शिक्षा झालेल्या लोकांच्या इलाख्यातून जाल, तर रडत रडत म्हणजे अल्लाहच्या शिक्षेपासून आश्रय मागत मागत पसार व्हा. (स.बुखारी, स.मुस्लीम) याच्याकडे ह.सॉलेह عليه السلام पैगंबर बनवून पाठविले गेले. ही 'आद' नंतरची घटना आहे. त्यांनी आपल्या पैगंबरांकडे मागणी केली की दगडाच्या शिळेपासून एक उंटीण काढून दाखव, जिला निघतांना आम्ही आपल्या डोळ्यांनी पहावे. ह.सॉलेह عليه السلام नी त्यांच्याकडून वचन घेतले की, याच्यानंतर सुद्धा त्यांनी ईमान आणले नाही तर, ते नष्ट करून टाकले जातील. त्याप्रमाणे अल्लाहतआलाने त्यांच्या मागणीनुसार उंटीण जाहीर करून दिली. या उंटीणीच्या बाबतीत त्यांना ताकीद करून दिली गेली, की तिला वाईट इराद्याने कोण्या माणसाने हात लावू नये. नाहीतर अल्लाहच्या शिक्षेच्या पकडीत येऊन जाल. परंतु त्या जुलूमी लोकांनी त्या उंटीणीला देखील ठार करून टाकले. ज्याच्या तीन दिवसानंतर त्यांना भयंकर मोठ्या आवाजाच्या भूकंपाच्या शिक्षेने नष्ट करून टाकण्यात आले. ज्याच्याने ते आपल्या घरात पालथेचे पालथे पडून राहिले.

وَ اذْكُرُوْٓا اِذْ جَعَلَكُمْ خُلَفَآءَ مِنْۢ بَعْدِ عَادٍ
وَّ بَوَّاَكُمْ فِی الْاَرْضِ تَتَّخِذُوْنَ مِنْ سُهُوْلِهَا
قُصُوْرًا وَّ تَنْحِتُوْنَ الْجِبَالَ بُيُوْتًا ۚ فَاذْكُرُوْٓا
اٰلَآءَ اللّٰهِ وَ لَا تَعْثَوْا فِی الْاَرْضِ مُفْسِدِيْنَ ﴿٧٤﴾

आणि तुम्ही या गोष्टीचे स्मरण ठेवा की, अल्लाहतआलाने तुम्हास 'आद' नंतर वारसदार बनविले. आणि जमिनीवर रहाण्याचे ठिकाण दिले की, नरम जमिनीत टोलेजंग इमारती बनवतात[१]; आणि पर्वतांना कोरून कोरून त्यांच्यांत घरे बनवतात[२].मग अल्लाहतआलाच्या देणग्यांचे स्मरण करा. आणि पृथ्वीत फसाद फैलावू नका[३] ७४

قَالَ الْمَلَاُ الَّذِيْنَ اسْتَكْبَرُوْا مِنْ قَوْمِهٖ لِلَّذِيْنَ
اسْتُضْعِفُوْا لِمَنْ اٰمَنَ مِنْهُمْ اَتَعْلَمُوْنَ اَنَّ
صٰلِحًا مُّرْسَلٌ مِّنْ رَّبِّهٖ ؕ قَالُوْٓا اِنَّا بِمَآ اُرْسِلَ
بِهٖ مُؤْمِنُوْنَ ﴿٧٥﴾

यांच्या लोकांत जे गर्विष्ठ सरदार होते, त्यांनी गरीब लोकांना जे की, त्यांच्यातून ईमान घेऊन आले होते विचारले काय तुम्हांस या गोष्टीचा विश्वास आहे की, सॉलेह, आपल्या पालनकर्त्याकडून पाठविलेले आहेत ? त्यांनी सांगितले की, नि:संशय आम्ही तर याच्यावर परिपूर्ण विश्वास ठेवतो, जे यांना देऊन पाठविण्यात[४] आले आहे ७५

قَالَ الَّذِيْنَ اسْتَكْبَرُوْٓا اِنَّا بِالَّذِیْٓ اٰمَنْتُمْ بِهٖ كٰفِرُوْنَ ﴿٧٦﴾

ते गर्विष्ठ लोक म्हणू लागले, तुम्ही ज्या गोष्टीवर विश्वास आणला आहे, आम्ही तर त्याला नाकारणारे आहोत[५] ७६

فَعَقَرُوا النَّاقَةَ وَ عَتَوْا عَنْ اَمْرِ رَبِّهِمْ وَ قَالُوْا
يٰصٰلِحُ ائْتِنَا بِمَا تَعِدُنَآ اِنْ كُنْتَ مِنَ الْمُرْسَلِيْنَ ﴿٧٧﴾

मग त्यांनी त्या उंटणीला मारून टाकले आणि आपल्या पालनकर्त्याच्या हुकूमाशी शिरजोरी केली; आणि म्हणू लागले, हे सॉलेह! ज्याची तुम्ही आम्हास धमकी देत होता, त्याला बोलवा, जर तुम्ही पैगंबर आहांत ७७

فَاَخَذَتْهُمُ الرَّجْفَةُ فَاَصْبَحُوْا فِیْ دَارِهِمْ جٰثِمِيْنَ ﴿٧٨﴾

मग त्यांना धरणीकंपाने येऊन गाठले[६], तेव्हा ते आपल्या घरांत पालथेचे पालथे पडून राहिले ७८

فَتَوَلّٰى عَنْهُمْ وَ قَالَ يٰقَوْمِ لَقَدْ اَبْلَغْتُكُمْ رِسَالَةَ رَبِّیْ
وَ نَصَحْتُ لَكُمْ وَ لٰكِنْ لَّا تُحِبُّوْنَ النّٰصِحِيْنَ ﴿٧٩﴾

यावेळी (सॉलेह) त्यांच्यापासून तोंड फिरवून जाऊ लागले आणि म्हणू लागले[७], हे माझ्या लोकांनो! मी तर तुम्हांस आपल्या पालनकर्त्याचा हुकूम पोहचवून दिला होता; आणि मी तुमचे भले इच्छिले; परंतु तुम्ही लोक भले इच्छिणाऱ्यांना पसंत करीत नाही ७९

وَ لُوْطًا اِذْ قَالَ لِقَوْمِهٖٓ اَتَاْتُوْنَ الْفَاحِشَةَ
مَا سَبَقَكُمْ بِهَا مِنْ اَحَدٍ مِّنَ الْعٰلَمِيْنَ ﴿٨٠﴾

आणि आम्ही लूतला पाठविले[८]; जेव्हा की त्यांनी आपल्या लोकांना सांगितले की, तुम्ही असे निर्लज्ज काम करीत आहात, ज्याला तुमच्यापूर्वी कोणीही सकल जगांतून केले नाही ८०

اِنَّكُمْ لَتَاْتُوْنَ الرِّجَالَ شَهْوَةً مِّنْ دُوْنِ النِّسَآءِ ؕ
بَلْ اَنْتُمْ قَوْمٌ مُّسْرِفُوْنَ ﴿٨١﴾

तुम्ही पुरूषांबरोबर वासनापूर्ती करतात[९]; स्त्रियांना सोडून[१०] किंबहुना तुम्ही तर मर्यादेच्या बाहेर निघून गेला आहांत[११] ८१

وَ مَا كَانَ جَوَابَ قَوْمِهٖٓ اِلَّآ اَنْ قَالُوْٓا اَخْرِجُوْهُمْ
مِّنْ قَرْيَتِكُمْ ۚ اِنَّهُمْ اُنَاسٌ يَّتَطَهَّرُوْنَ ﴿٨٢﴾

आणि त्याचे लोक याचे काही उत्तर देऊ शकले नाहीत, या शिवाय की, आपसांत म्हणू लागले की, या लोकांना आपल्या वस्तीतून काढून लावा;हे लोक मोठे पाकसाफ बनत आहे[१२] ८२

१) याचा अर्थ आहे की नरम जमिनीतून माती घेऊन विटा तयार करतात; आणि विटांपासून टोलेजंग इमारती. जशा आज सुद्धा भट्ट्यांवर अशाच प्रकारे मातीपासून विटा तयार केल्या जातात.

२) ही त्यांची शक्ती शरीराची मजबूती आणि कौशल्याच्या कमालीचे द्योतक आहे.

३) म्हणजे या देणग्यांवर अल्लाहचे आभार माना; आणि त्यांच्या आज्ञापालनाचा मार्ग चोखाळा. देणग्यांच्या प्रति कृतघ्नता आणि गुन्ह्यांचे आचरण करून फसाद फैलावू नका.

४) म्हणजे जे एकेश्वरवादाचे आमंत्रण ते घेऊन आले आहेत, ते कारण की, प्रकृतिचा आवाज आहे, आम्ही तर यावर ईमान घेऊन आलो आहोत. मग राहिली ही गोष्ट की, काय सॉलेह खरोखरच अल्लाहचे पैगंबर आहेत ? जो त्यांचा प्रश्न होता, त्याला या ईमानवाल्यांनी, नुसते धुडकावूनच लावले नाही; कारण की त्याचे अल्लाहकडून पैगंबर होणे,

याला ते वादविवादाला योग्य समजतच नव्हते. त्यांच्याजवळ त्यांची पैगंबरी एक मानलेले वास्तव व सत्य होते. जसे की वास्तवतेत तसेच होते.

५) या ठोस उत्तरावर सुद्धा, ते आपल्या गर्वावर आणि नाकारण्यावर अडून राहिले.

६) येथे 'रजफतुन' (भूकंपाचा) उल्लेख आहे. दुसऱ्या ठिकाणी 'सयहतन्' (आरोळी) चा. याच्याने असे वाटते की, या दोन्ही प्रकारच्या शिक्षा त्यांच्यावर आल्यात. वरून कडक आरोळी व खालून भूकंप या दोन्ही शिक्षांनी त्यांना तबाह आणि बर्बाद करून टाकले.

७) हे एक तर बर्बादीच्या पूर्वीचे संबोधन आहे, किंवा बर्बादीनंतर अशा प्रकारचे संबोधन आहे, ज्याप्रमाणे रसूल ﷺ नी बद्रचे युद्ध संपल्यानंतर एका बद्रच्या विहीरीत मुशरिकीनच्या प्रेतांना संबोधित केले होते.

८) ह.लूत عليه السلام ह. इब्राहीम عليه السلام चे पुतणे होते आणि ह.इब्राहीम عليه السلام वर ईमान आणणाऱ्यांमधून होते. मग स्वत: त्यांना सुद्धा अल्लाहतआलाने एका इलाख्यांत पैगंबर बनवून पाठविले. हा इलाखा उर्दन आणि बैतुल मुकद्दसच्या दरम्यान होता. ज्याला 'सदूम' म्हटले जाते. ही जमीन सुजलाम् सुफलाम् होती. आणि येथे प्रत्येक प्रकारचे धान्य आणि फळफळावळ यांची रेलचेल होती. कुरआनाने या जागेला 'मोतफिका' किंवा 'मौतफिकात' च्या शब्दांनी उल्लेखित केले आहे. ह.लूत عليه السلام नी कदाचित् सर्वांत प्रथम किंवा, एकेश्वरवादाच्या आमंत्रणासह (जे प्रत्येक पैगंबराचे पायाभूत आमंत्रण होते; आणि सर्वांत प्रथम हे यांचे आमंत्रण आपल्या लोकांना देत असत; जसे की मागच्या पैगंबरांच्या अहवालात त्यांचा उल्लेख पण येऊन चुकला आहे, पाहिले जाऊ शकते) जे दुसरे मोठे वाईट कृत्य पुरूषांबरोबर कुकृत्य, लूत عليه السلام च्या लोकांत होते, त्यांचे घाणेरडेपण आणि अत्यंत वाईट असणे, वर्णन केले. याचे कारण असे वाटते की, हा एक असा अपराध आहे, ज्याला जगांत सर्व प्रथम याच लूत عليه السلام च्या लोकांनी केले. म्हणून योग्य समजण्यांत आले की, प्रथम समाजाच्या या अपराधाच्या भयंकरपणापासून सावध केले जावे. शिवाय ह.इब्राहीम عليه السلام च्या मार्फत एकेश्वरवादाचे आमंत्रण येथे पोहचून चुकले असावे. समलिंगी संभोगाच्या बाबतीत, इमामांध्ये मतभेद आहे. काही इमामांजवळ त्याची तीच शिक्षा आहे जी व्याभिचारासाठी आहे. म्हणजे जर अपराधी विवाहीत असेल, तर धोंडमार, अविवाहीत असेल तर शंभर कोडे, काहींच्या जवळ याची शिक्षाच धोंडमार आहे, मग अपराधी कसा काअसेना आणि काहींजवळ करणारा आणि करवून घेणारा दोघांना ठार करून टाकले जावे.

९) म्हणजे पुरूषांजवळ तुम्ही या निर्लज्जपणाच्या कामासाठी, केवळ काम वासनापूर्तीसाठी येतात. त्याशिवाय तुमची अशी कोणती गरज नसते, जी बुद्धीला साजेशी असेल. या दृष्टीने ते बिल्कुल चतुष्पादाप्रमाणे होते, जे केवळ वासनापूर्तीसाठी एक दुसऱ्यावर चढतात.

१०) जे वासनापूर्तीचे मूळ ठिकाण आणि मजा प्राप्त करण्याची खरी जागा आहे हा त्यांच्या प्राकृतिक स्वरूपाला बदलून देण्याकडे इशारा आहे. म्हणजे अल्लाहने पुरूषाच्या लैंगिक मजेच्या समाधानासाठी स्त्रीच्या गुप्तेंद्रियाला याचे स्थळ आणि योग्य बनविले आहे आणि या जुलूमी लोकांनी याच्या पलीकडे जाऊन पुरूषाच्या पार्श्वभागाला याचेकरीता उपयोग करण्याला सुरू करून दिली.

११) परंतु आता या नैसर्गिक योग्य कामात फेरबदल करण्याला आणि अल्लाहच्या बांधिव मर्यादेचे उल्लंघन करण्याला पश्चिमेच्या 'सुधारलेल्या' लोकांनी अंगिकारले आहे. तर हा मानवाचा 'मुलभूत हक्क' ठरविण्यात आला आहे. ज्याला मना करण्याचा कोणाला अधिकार नाही. जसे की आता तेथे समलिंगी संभोगाला कायदेशीर संरक्षण प्राप्त झाले आहे. हा सुरवातीपासून अपराधच राहिला नाही.

''फ इन्ना लिल्लाहे व इन्ना इलैहि राजेऊन''

१२) ही ह. लूत عليه السلام ला वस्तीच्या बाहेर काढण्याची सबब आहे. बाकी त्यांच्या पवित्रतेचे प्रदर्शन एक तर वास्तव म्हणून आहे; आणि त्यांचा उद्देश हा असावा की, हे लोक त्या वाईट गोष्टीपासून वाचू इच्छितात यासाठी उत्तम आहे की, त्यांनी आमच्या बरोबर आमच्या वस्तीतच न रहावे किंवा टिंगल आणि थट्टा म्हणून त्यांनी असे सांगितले.

فَأَنْجَيْنٰهُ وَأَهْلَهٗٓ إِلَّا امْرَأَتَهٗ ۖ كَانَتْ مِنَ الْغٰبِرِيْنَ ﴿٨٣﴾

**तर आम्ही लूतला आणि त्यांच्याशी संबंधित लोकांना वाचवून घेतले; शिवाय त्यांच्या पत्नीच्या की जी याच लोकांत राहिली; जे शिक्षेस राहून गेले होते[१] ८३**

وَأَمْطَرْنَا عَلَيْهِمْ مَّطَرًا ۖ فَانْظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُجْرِمِيْنَ ﴿٨٤﴾

**आणि आम्ही त्यांच्यावर (एक नव्या प्रकारचा) पाऊस[२] वर्षविला; मग पहा तर खरे! या गुन्हेगारांचा काय परिणाम झाला[३] ८४**

وَإِلٰى مَدْيَنَ أَخَاهُمْ شُعَيْبًا ۗ قَالَ يٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ إِلٰهٍ غَيْرُهٗ ۗ قَدْ جَآءَتْكُمْ بَيِّنَةٌ مِّنْ رَّبِّكُمْ فَأَوْفُوا الْكَيْلَ وَالْمِيْزَانَ وَلَا تَبْخَسُوا النَّاسَ أَشْيَآءَهُمْ وَلَا تُفْسِدُوْا فِي الْأَرْضِ بَعْدَ إِصْلَاحِهَا ۚ ذٰلِكُمْ خَيْرٌ لَّكُمْ إِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿٨٥﴾

**आणि आम्ही 'मदयन' कडे त्यांचा भाऊ शोएब (अ.) ला पाठविले[४]; त्यांनी सांगितले, हे माझ्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची उपासना करा; त्याच्याशिवाय (अन्य) कोणी तुमचा उपास्य नाही. तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याकडून स्पष्टप्रमाण येऊन चुकले आहे. मग तुम्ही माप आणि तोल, पुरा पुरा करा; आणि लोकांना त्यांच्या वस्तू कमी करून देऊ नका[५] आणि जमिनीवर त्यांच्यात सुधारणा करून दिल्यानंतर फसाद फैलावू नका. हे तुम्हांस फायदेकारक आहे, जर तुम्ही मान्य कराल ८५**

وَلَا تَقْعُدُوْا بِكُلِّ صِرَاطٍ تُوْعِدُوْنَ وَتَصُدُّوْنَ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ مَنْ اٰمَنَ بِهٖ وَتَبْغُوْنَهَا عِوَجًا ۚ وَاذْكُرُوْٓا إِذْ كُنْتُمْ قَلِيْلًا فَكَثَّرَكُمْ ۖ وَانْظُرُوْا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُفْسِدِيْنَ ﴿٨٦﴾

**आणि तुम्ही रस्त्यांवर यासाठी बसू नका की, अल्लाहवर ईमान आणणाऱ्यांना, धमक्या द्याव्यांत आणि अल्लाहच्या मार्गापासून रोकावे. आणि त्यांच्यात वाकडेपणा शोधत बसावे[६] आणि त्या स्थितीचे स्मरण करा की जेव्हा तुम्ही थोडे होता. तर अल्लाहने तुम्हास जास्त करून दिले. आणि पहा की, फसाद करणाऱ्यांचा काय परिणाम झाला ८६**

وَإِنْ كَانَ طَآئِفَةٌ مِّنْكُمْ اٰمَنُوْا بِالَّذِيْٓ أُرْسِلْتُ بِهٖ وَطَآئِفَةٌ لَّمْ يُؤْمِنُوْا فَاصْبِرُوْا حَتّٰى يَحْكُمَ اللّٰهُ بَيْنَنَا ۚ وَهُوَ خَيْرُ الْحٰكِمِيْنَ ﴿٨٧﴾

**आणि जर तुमच्यातून काही लोक त्या हुकूमावर जो देऊन मला पाठविण्यांत आले, ईमान घेऊन आले आहेत, आणि काहींनी ईमान आणले नाही, तर जरा धीर धरा[७]; येथपावेतो की, आमच्या दरम्यान अल्लाह निर्णय करून देत आहे आणि सर्व निर्णय करणाऱ्यांपेक्षा (तो)चांगला आहे ८७**

१) म्हणजे ती त्या लोकांत बाकी राहिली, ज्यांच्यावर अल्लाहची शिक्षा आली; कारण ती पण मुसलमान नव्हती. आणि तिची सहानुभूती पण अपराधी लोकांबरोबर होती. काहींनी याचे भाषांतर 'बर्बाद होणाऱ्यांमधून'' केले आहे.

२) हा खास प्रकारचा वर्षाव काय होता ? दगडांचा वर्षाव ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आम्ही त्यांच्यावर सतत दगडांची वर्षा वर्षविली.'' (सू. हूद - ८२) याच्यापूर्वी सांगितले, ''आम्ही त्या वस्तीला उलटून वर खाली करून टाकले.'' (जअलना आलियहा साफिलहा)

३) ''म्हणजे हे.मुहम्मद ﷺ जरा पहा तर खरे जे लोक जाहीररीत्या अल्लाहच्या गुन्ह्याचा प्रयत्न करतात; आणि पैगंबरांना खोटे पाडतात, त्यांचा परिणाम काय होतो ?''

४) 'मदयन' हे ह.इब्राहीम عليه السلام च्या मुलाचे किंवा नातवाचे नांव होते. त्यांच्याच वंशावर आधारित घराण्याचे नाव पण 'मदयन' आणि ज्या वस्तीत हे रहात होते, तिचे नांव पण 'मदयन' पडून गेले. अशा प्रकारे याचा उपयोग घराणे आणि वस्ती दोघांसाठी होतो. ही वस्ती हिजाजच्या मार्गावर 'मआन' च्याजवळ आहे. यांनाच कुरआनात दुसऱ्या ठिकाणी 'असहाबुल ऐका' (वनातील रहाणारे) पण म्हटले गेले आहे. त्यांच्याकडे ह.शोएब عليه السلام पैगंबर बनवून पाठविले गेले. (पहा.सू.शुअरा - १७६ चा समास)

**मलहुजा** :- प्रत्येक पैगंबराला त्या लोकांचा भाऊ म्हटले गेले आहे. ज्याचा अर्थ तो त्या लोकांपैकी आणि घराण्यापैकी एक व्यक्ती आहे. ज्याला काही ठिकाणी 'रसुलम् मिनहुम' किंवा 'मिन अनफुसेहिम' ने पण सांगण्यांत आले आहे.

आणि अर्थ या सर्वांचा हा आहे की, रसूल आणि नबी मानवांमधूनच एक मानव असतो. ज्याला अल्लाहतआला लोकांच्या मार्गदर्शनासाठी निवडून घेतो. आणि 'वह्य' च्या मार्फत आपले पुस्तक आणि आदेश अवतरीत करीत असतो.

५) एकेश्वरवादाच्या आमंत्रणानंतर, त्या लोकांत मापतोलाच्या कमी देण्याचे जे मोठे वाईट काम होते, यापासून त्यांना मना केले; आणि पुरेपुर माप व तोल करून देण्याला सांगितले. ही कोताई सुद्धा फार भयानक आहे. ज्यामुळे या लोकांच्या चारित्र्याचा ऱ्हास आणि पतनाचा पत्ता लागतो. ज्यांच्यात हा दुर्गुण असेल, तर ही अत्यंत वाईट लबाडी आहे. की, पैसे पूर्ण घेतले जावे; आणि वस्तू कमी दिली जावी. याचकरता सू.मुत्फ्फेफिन मध्ये अशा लोकांसाठी बर्बादीची खबर देण्यात आली आहे.

६) अल्लाहच्या मार्गापासून रोकण्यासाठी अल्लाहच्या मार्गात वक्रता शोधणे हा प्रत्येक काळांतील आज्ञाभंजकांचा प्रिय चाळा राहिला आहे; ज्याचे नमुने आजकालचे धर्मात सुधारणेचे इच्छुक 'पश्चिमे' चा परिणाम झालेल्या लोकांमध्ये सुद्धा दिसून येतो. --अआ जनल्लाहु मिनहु - याशिवाय रस्त्यांत बसण्याचे आणखी कित्येक भावार्थ सांगण्यांत आले आहे. उदाहरणार्थ लोकांना सतविण्याकरीता बसणे. जसे सर्व साधारणपणे उडाणटप्पू प्रकारच्या लोकांचा हा चाळा असतो. किंवा ह.शोएब عليه السلام कडे जाणाऱ्या रस्त्यांत बसणे; की त्यांच्याकडे जाणाऱ्यांना रोकावे. आणि त्यांना त्यांचेकडून (शोएब عليه السلام कडून) बदगुमान करावे. जसे मक्केचे कुरैश करीत असत, किंवा धर्माच्या मार्गावर बसणे; आणि मार्गावर चालणाऱ्यांना रोकावे किंवा लुटमारच्या उद्देशाने नाक्यांवर बसणे की त्याने येणाऱ्या जाणाऱ्यांचा माल लुटून घ्यावा किंवा काहींच्याजवळ महसूल आणि टोल वसूल करण्यासाठी त्यांचे रस्त्यांवर बसणे. इमाम शौकानी म्हणतात, की सर्वच भावार्थ बरोबर असू शकतात. कारण की शक्य आहे की ते हे सर्वकाही करीत असतील. (फत्हुल कदीर)

७) हा कुफ्रवर सहन करण्याचा हुकूम नाही. किंबहुना त्याच्याकरता सख्त धमकी आहे कारण की, अल्लाहतआलाचा निर्णय सत्यवाल्यांचा निरर्थकवाल्यांवर विजय आणि वरचष्म्याचाच असतो. हे असेच आहे जसे, दुसऱ्या ठिकाणी सांगितले. ''फतरब्बसु इन्ना मअकुम् मुतरब्बीसून'' ''बस तुम्हीही प्रतीक्षा करा नि:संशय आम्ही देखील तुमच्या बरोबर प्रतीक्षा करणारे आहोत.'' (सू. तौबा-५२)

**त्यांच्या लोकांतील गर्विष्ठ सरदारांनी सांगितले की, हे शोएब! आम्ही तुम्हास आणि जे तुमच्याबरोबर ईमानवाले आहेत, त्यांना आपल्या वस्तीतून बाहेर काढून देऊ; किंवा हे की, तुम्ही आमच्या धर्मांत पुन्हा फिरून याल[1]. शोएब (अ.) ने उत्तर दिले, काय आम्ही तुमच्या धर्मांत येऊन जावे, जरी आम्ही त्यास नापसंत समजत असू[2] ८८**

قال الملأ الذين استكبروا من قومه لنخرجنك
يشعيب والذين امنوا معك من قريتنا او
لتعودن في ملتنا ط قال اولو كنا كرهين ٨٨

**आम्ही तर अल्लाहवर खोटे कुभांड रचणारे होऊन जाऊ, जर आम्ही तुमच्या धर्मांत येऊन जाऊ; यानंतर की, अल्लाहतआलाने आम्हास यापासून मुक्ती[3] दिली; आणि आम्हास शक्य नाही की, तुमच्या धर्मांत परत फिरून यावे; परंतु हे की, अल्लाहनेच जो की आमचा मालक आहे, त्याचीच इच्छा असेल[4]. आमच्या पालनकर्त्याचे ज्ञान प्रत्येक वस्तुला घेरून आहे; आम्ही अल्लाहवरच भरोसा ठेवतो[5]. हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या आणि आमच्या लोकात सत्य सत्य निवाडा कर. आणि तू सर्वात उत्तम निवाडा करणारा आहेस[6] ८९**

قد افترينا على الله كذبا ان عدنا في ملتكم
بعد اذ نجنا الله منها ط وما يكون لنا ان نعود
فيها الا ان يشاء الله ربنا ط وسع ربنا كل
شيء علما ط على الله توكلنا ط ربنا افتح بيننا
وبين قومنا بالحق وانت خير الفتحين ٨٩

**आणि त्या लोकांच्या काफिर सरदारांनी सांगितले, जर तुम्ही शोएब (अ.) च्या मार्गावर चालाल, तर नि:संशय मोठे नुकसान करून घ्याल[7] ९०**

وقال الملأ الذين كفروا من قومه لئن اتبعتم
شعيبا انكم اذا لخسرون ٩٠

१) या सरदारांच्या गर्वाचा आणि शिरजोरीचा अंदाज करा की त्यांनी, ईमान आणि एकेश्वरवादाच्या आमंत्रणालाच रद्द केले नाही, किंबहुना याच्याही पलिकडे जाऊन, अल्लाहचे पैगंबर आणि त्यांच्या ईमान आणणाऱ्यांना धमकी दिली की, एकतर आपल्या वाडवडीलांच्या धर्मावर परत येऊन जा, नाहीतर आम्ही तुम्हास येथून काढून टाकू. ईमानवाल्यांची आपल्या पूर्वीच्या धर्माकडे परतून न येण्याची गोष्ट तर समजली जाऊ शकते; कारण की त्यांनी कुफ्र सोडून ईमानाचा अंगिकार केला होता. परंतु ह.शोएब ﷺ ला पण वाडवडीलांच्या धर्माकडे परतण्याचे आमंत्रण या दृष्टीने होते की, ते त्यांनापण पैगंबरी आणि प्रचार व प्रसारापूर्वी ते त्यांना आपल्या धर्माचेच समजत होते; जरी वास्तव असे नसावे किंवा दबाव टाकण्यासाठी त्यांना पण शामील करून घेतले असावे.

२) म्हणजे काय तुम्ही आम्हास आपल्या धर्माकडे परतवून न्याल? किंवा आम्हास आपल्या वस्तीतून काढून लावाल? वास्तविक पाहता, आम्ही त्या धर्मांत परतून जाणे आणि या वस्तीतून निघून जाणे, पसंत करीत नसतो? अर्थ हा आहे की, तुमच्याकरता ही गोष्ट योग्य नाही; की, तुम्ही आम्हांस यातून कोण्या एका गोष्टीला अंगिकारण्यास भाग पाडावे.

३) म्हणजे जर आम्ही दुसऱ्यांदा त्या वाडवडीलांच्या धर्माकडे परतून येऊ, ज्यापासून अल्लाहने आम्हास सुटका दिली; तर याचा अर्थ असा होईल की, आम्ही ईमान आणि एकेश्वरवादाचे आमंत्रण देऊन, अल्लाहवर खोटे कुभांड रचले होते? अर्थ हा होता की, हे शक्यच नाही की, आमच्याकडून असे व्हावे.

४) आपला इरादा जाहीर केल्यानंतर मामला अल्लाहच्या मर्जीवर सोपवून दिला. म्हणजे आम्ही तर आमच्या खुषीने आता कुफ्रकडे पलटू शकत नाही. हां! पण जर अल्लाह इच्छिल तर वेगळी गोष्ट आहे.

५) की तो आम्हांस ईमानावर स्थिर ठेवील. आणि आमच्या आणि कुफ्र व कुफ्रवाले यांच्या दरम्यान आड होऊन जाईल. आमच्यावर आपल्या देणग्या पूर्ण करील; आणि आपल्या शिक्षेपासून सुरक्षित ठेवील.

६) आणि अल्लाह जेव्हा निर्णय करून घेतो तर तो, निर्णय हाच असतो की, ईमानवाल्यांना वाचवून खोटे ठरवणाऱ्यास आणि अहंकार करणाऱ्यांना नष्ट करून टाकतो. हे जणूअल्लाहच्या शिक्षेच्या अवतरण्याची मागणी करणेच आहे.

७) आपल्या वाडवडीलांच्या धर्माला सोडणे आणि मापातोलात कमी न करणे, ही त्यांच्याजवळ घाट्याची गोष्ट होती. वास्तविक पाहता, या दोन्ही गोष्टीत, त्यांचाच फायदा होता. परंतु दुनियावाल्यांच्या दृष्टीत, तात्कालिक नफा (जगात ताबडतोब प्राप्त होणारा नफा) हाच सर्व काही असतो. जो नापतोलात दांडी मारून त्यांना प्राप्त होत होता. ते ईमानवाल्याप्रमाणे परलोकाचा नफा आजिल, (म्हणजे उशीराने मिळणारा नफा) साठी त्याला का सोडते?

فَاَخَذَتۡهُمُ الرَّجۡفَةُ فَاَصۡبَحُوۡا فِىۡ دَارِهِمۡ جٰثِمِيۡنَ ﴿٩١﴾

मग त्यांना भूकंपाने येऊन गाठले, तेव्हा ते आपल्या घरात, पालथेचे पालथे पडून राहिले[१] (९१)

الَّذِيۡنَ كَذَّبُوۡا شُعَيۡبًا كَاَنۡ لَّمۡ يَغۡنَوۡا فِيۡهَا ۛۚ
الَّذِيۡنَ كَذَّبُوۡا شُعَيۡبًا كَانُوۡا هُمُ الۡخٰسِرِيۡنَ ﴿٩٢﴾

ज्यांनी शोएब (अ.) ला खोटे ठरवले होते, त्यांची अशी स्थिती होऊन गेली, जसे या घरात पूर्वी वसलेच नव्हते[२]. ज्यांनी शोएब (अ.) ला खोटे म्हटले होते, तेच घाट्यांत पडून गेले[३] (९२)

فَتَوَلّٰى عَنۡهُمۡ وَقَالَ يٰقَوۡمِ لَقَدۡ اَبۡلَغۡتُكُمۡ رِسٰلٰتِ
رَبِّىۡ وَنَصَحۡتُ لَـكُمۡ ۚ فَكَيۡفَ اٰسٰى عَلٰى قَوۡمٍ كٰفِرِيۡنَ ﴿٩٣﴾

यावेळी शोएब (अ.) त्यांच्याकडून तोंड फिरवून चालले, आणि म्हणू लागले की, हे माझ्या लोकांनो! मी तुम्हास आपल्या पालनकर्त्याचे आदेश पोहचवून दिले होते; आणि तुमचे भले इच्छिले,मग मी या काफिर लोकांवर का खेद करावा[४] (९३)

وَمَاۤ اَرۡسَلۡنَا فِىۡ قَرۡيَةٍ مِّنۡ نَّبِىٍّ اِلَّاۤ اَخَذۡنَاۤ اَهۡلَهَا
بِالۡبَاۡسَآءِ وَالضَّرَّآءِ لَعَلَّهُمۡ يَضَّرَّعُوۡنَ ﴿٩٤﴾

आणि आम्ही कोण्या वस्तीत, कोणी पैगंबर पाठविला नाही; की तेथे रहाणाऱ्यांना आम्ही रोग आणि दारिद्रयांत न पकडले असेल, कारण की ते गयावया करतील[५] (९४)

ثُمَّ بَدَّلۡنَا مَكَانَ السَّيِّئَةِ الۡحَسَنَةَ حَتّٰى عَفَوْا
وَّقَالُوۡا قَدۡ مَسَّ اٰبَآءَنَا الضَّرَّآءُ وَالسَّرَّآءُ فَاَخَذۡنٰهُمۡ
بَغۡتَةً وَّهُمۡ لَا يَشۡعُرُوۡنَ ﴿٩٥﴾

मग आम्ही या दु:खाच्या जागी सुख बदलून दिले; येथपर्यंत की त्यांची खूप प्रगती झाली. आणि म्हणू लागले की, आमच्या वाडवडीलांना देखील सुखदु:खाचा सामना करावा लागला होता; तर आम्ही अचानक त्यांना पकडून घेतले[६]. आणि त्यांना याचा भासपण झाला नाही (९५)

१) येथे 'रजफतुन' (भूकंप) चा शब्द आला आहे आणि सू. हूद आ.९४ मध्ये 'सयहतून' (आरोळी) चा शब्द आहे. आणि सू.शुअरा आ.१८९ मध्ये 'जुल्लतुन' (ढगांची सावली) चे शब्द आहेत. इमाम इब्ने कसीर म्हणतात की, शिक्षेमध्ये सर्वच गोष्टी एकत्रित झाल्यात. म्हणजे सावलीवाल्या दिवसात त्यांच्यावर शिक्षा आली. प्रथम ढगाने त्यांच्यावर सावली केली; ज्यात ज्वाला, ठिणग्या आणि अग्नी चे लोळ होते. मग आकाशातून कडक आरोळी आली, आणि जमिनीतून धरणीकंप; ज्याच्याने त्यांचे प्राण हरण होऊन गेले आणि प्राणहीन होऊन त्यांची प्रेते पक्ष्याप्रमाणे गुडघ्यात तोंड देऊन, पालथेचे पालथे पडून राहिले.

२) म्हणजे ज्या वस्तीतून हे अल्लाहचे पैगंबर आणि त्यांच्या अनुयायांना काढण्यावर ते पक्के आमादा झाले होते, अल्लाहकडून अजाब अवतरीत झाल्यानंतर असे होऊन गेले, जसे ते येथे रहातच नव्हते.

३) म्हणजे घाट्यात तेच लोक राहिले, ज्यांनी पैगंबराला खोटे म्हटले; न की, पैगंबर आणि त्यांच्यावर ईमान आणणारे. आणि घाटासुद्धा दोन्ही जगतात. इहलोकांत सुद्धाअप्रतिष्ठेची शिक्षा चाखली, आणि परलोकांत याच्यापेक्षा कितीतरी जास्त कठीण शिक्षा त्यांच्यासाठी तयार आहे.

४) शिक्षा आणि बर्बादीच्या नंतर, जेव्हा ते तेथून चालले, तेव्हा त्यांनी भावनाविवश होऊन या गोष्टी केल्या. आणि या बरोबरच सांगितले की, जेव्हा मी प्रचार करण्याचा हक्क अदा करून दिला आणि अल्लाहचा संदेश त्यांच्यापर्यंत पोहचवून दिला; तर मग मी अशा लोकांवर खेद का म्हणून करावा? जे यावर सुध्दा आपल्या कुफ्र आणि शिर्कवर अडून राहिले.

५) 'बअसाअ्' त्या इजा ज्या माणसाच्या शरीराला होतच असाव्या, म्हणजे आजार. आणि 'जर्राअ' ने अभिप्रेत दारिद्र्य आणि तंगी. अर्थ हा आहे की, ज्या कोण्या वस्तीमध्ये, आम्ही पैगंबर पाठविला, त्यांनी त्याला खोटे म्हटले, त्याच्या शिक्षेत, आम्ही त्यांना आजार आणि दारिद्र्याने पिडले; ज्याचा उद्देश हा होता की, त्यांनी अल्लाहकडे वळावे व काकुळतेने त्याच्या गयावया कराव्यात.

६) म्हणजे दारिद्र्य आणि आजारात व्यस्त होऊन सुद्धा, जेव्हा त्यांच्यात अल्लाहकडे वळण्याची भावना निर्माण झाली नाही, तर आम्ही त्यांच्या तंगदस्तीला समृद्धतेने आणि आजाराला तंदुरूस्तीने बदलून दिले. कारण की, यावर त्यांनी अल्लाहचे आभार मानावेत. परंतु या स्थित्यंतरानें देखील, त्यांच्यात काही बदल झाला नाही. आणि त्यांनी म्हटले की, हे तर नेहमीच चालू असते की, कधी तंगी आली कधी सुख समृद्धी, कधी आजार तर कधी आरोग्य, कधी गरीबी, तर कधी श्रीमंती. म्हणजे तंगदस्तीचा पहिला इलाज त्यांच्या करता परिणामकारक झाला नाही की, सुख समृद्धीचा. त्यांच्या परिस्थितीत सुधारणा करण्यासाठी उपयुक्त ठरला नाही. ते याला रात्रंदिवस फिरणारे कालचक्रच समजत राहिले. आणि याच्या मागील कार्य करणारा आणि अल्लाहच्या सामर्थ्याला. आणि त्याच्या इरादाला समजण्यांत अयशस्वी राहिले. तेव्हा आम्ही त्यांना पुन्हा आमच्या शिक्षेत अचानक पकडून घेतले. याचसाठी हदीसमध्ये ईमानवाल्यांचा मामला याच्या उलट वर्णन केला गेला आहे, की ते सुखसमृद्धी मिळाल्यानंतर अल्लाहचे आभार मानतात; आणि त्रास पोहोचल्यावर सहनशिलतेने वागतात. अशाप्रकारे दोन्ही अवस्था त्यांच्यासाठी भलाई आणि चांगल्या बदल्याला कारणीभूत होतात. (स. मुस्लीम)

وَلَوْ أَنَّ أَهْلَ الْقُرَىٰ آمَنُوا وَاتَّقَوْا لَفَتَحْنَا عَلَيْهِم بَرَكَاتٍ مِّنَ السَّمَاءِ وَالْأَرْضِ وَلَٰكِن كَذَّبُوا فَأَخَذْنَاهُم بِمَا كَانُوا يَكْسِبُونَ ﴿٩٦﴾

आणि जर या वस्त्यांचे रहिवाशी ईमान घेऊन येते, आणि भिऊन वागते तर आम्ही त्यांच्यावर आकाश आणि पृथ्वीच्या बरकती उघडून देतो; परंतु त्यांनी खोटे म्हटले, म्हणून आम्ही त्यांना त्यांच्या कर्मांमुळे पकडून घेतले (९६)

أَفَأَمِنَ أَهْلُ الْقُرَىٰ أَن يَأْتِيَهُم بَأْسُنَا بَيَاتًا وَهُمْ نَائِمُونَ ﴿٩٧﴾

काय, तरी सुद्धा या वस्त्यांचे राहणारे, या गोष्टीकडून निर्भय होऊन गेले आहेत की, यांच्यावर आमची शिक्षा रात्रीच्यावेळी येऊन पडावी, ज्यावेळेस ते झोपलेले असतील (९७)

أَوَأَمِنَ أَهْلُ الْقُرَىٰ أَن يَأْتِيَهُم بَأْسُنَا ضُحًى وَهُمْ يَلْعَبُونَ ﴿٩٨﴾

आणि काय या वस्त्यांचे रहाणारे, या गोष्टीपासून निर्भय होऊन गेले आहेत की, त्यांच्यावर आमची शिक्षा दिवसा ढवळ्या येऊन पडावी आणि ते आपल्या खेळात गुंतलेले असतील (९८)

أَفَأَمِنُوا مَكْرَ اللَّهِ ۚ فَلَا يَأْمَنُ مَكْرَ اللَّهِ إِلَّا الْقَوْمُ الْخَاسِرُونَ ﴿٩٩﴾

काय मग ते अल्लाहच्या या पकडीपासून निर्भय होऊन गेले आहेत? तर अल्लाहच्या पकडीपासून त्यांच्याशिवाय की, ज्यांचा नाशच होणार असावा[१]; आणखी कोणी निर्भय होत नाही (९९)

أَوَلَمْ يَهْدِ لِلَّذِينَ يَرِثُونَ الْأَرْضَ مِن بَعْدِ أَهْلِهَا أَن لَّوْ نَشَاءُ أَصَبْنَاهُم بِذُنُوبِهِمْ ۚ وَنَطْبَعُ عَلَىٰ قُلُوبِهِمْ فَهُمْ لَا يَسْمَعُونَ ﴿١٠٠﴾

आणि काय या लोकांना जे जमिनीचे वारसदार झाले, तेथल्या लोकांच्या नष्ट होण्यानंतर, या चर्चित घटनांनी ही गोष्ट नाही दाखविली की, जर आम्ही इच्छू तर त्यांच्या अपराधांच्या कारणाने, त्यांना नष्ट करून टाकावे आणि त्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून टाकावी; की मग त्यांनी ऐकू शकू नये[२] (१००)

تِلْكَ الْقُرَىٰ نَقُصُّ عَلَيْكَ مِنْ أَنبَائِهَا ۚ وَلَقَدْ جَاءَتْهُمْ رُسُلُهُم بِالْبَيِّنَاتِ فَمَا كَانُوا لِيُؤْمِنُوا بِمَا كَذَّبُوا مِن قَبْلُ ۚ كَذَٰلِكَ يَطْبَعُ اللَّهُ عَلَىٰ قُلُوبِ الْكَافِرِينَ ﴿١٠١﴾

या वस्त्यांच्या काही काही गोष्टी आम्ही आपणांस वर्णन करून सांगत आहोत; आणि या सर्वांजवळ त्यांचे पैगंबर चमत्कार घेऊन आले[३]; मग ज्या गोष्टीला त्यांनी सुरवातीलाच खोटे म्हटले, तर ही गोष्ट झाली नाही की मग तिला मान्य करून घेते[४]. अल्लाहतआला अशाचप्रकारे काफिरांच्या अंत:करणावर मोहोर लावून देतो (१०१)

وَمَا وَجَدْنَا لِأَكْثَرِهِم مِّنْ عَهْدٍ ۖ وَإِن وَجَدْنَا أَكْثَرَهُمْ لَفَاسِقِينَ ﴿١٠٢﴾

आणि बहुतेक लोकात आम्ही करारपालन पावलो नाही[५]. आणि आम्ही बहुतेक लोकांस आज्ञाभंजकच पावलो (१०२)

ثُمَّ بَعَثْنَا مِن بَعْدِهِم مُّوسَىٰ بِآيَاتِنَا إِلَىٰ فِرْعَوْنَ وَمَلَئِهِ فَظَلَمُوا بِهَا ۖ فَانظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُفْسِدِينَ ﴿١٠٣﴾

मग आम्ही याच्यानंतर मूसाला आपल्या निशाण्या देऊन, फिरऔन आणि त्याच्या सरदारांजवळ पाठविले[६], परंतु त्या लोकांनी (या निशाण्यांचा) बिलकुल हक्क अदा केला नाही. तर पहा की फिसाद खोरांचा कसा परिणाम झाला[७] (१०३)

وَقَالَ مُوسَىٰ يَا فِرْعَوْنُ إِنِّي رَسُولٌ مِّن رَّبِّ الْعَالَمِينَ ﴿١٠٤﴾

आणि मूसाने सांगितले की, हे फिरऔना! मी सकल जगांच्या पालनकर्त्याकडून पैगंबर आहे (१०४)

حَقِيقٌ عَلَىٰ أَن لَّا أَقُولَ عَلَى اللَّهِ إِلَّا الْحَقَّ ۚ قَدْ جِئْتُكُم بِبَيِّنَةٍ مِّن رَّبِّكُمْ فَأَرْسِلْ مَعِيَ بَنِي إِسْرَائِيلَ ﴿١٠٥﴾

माझे कर्तव्य आहे की, सत्याशिवाय अल्लाहकडे कोणतीच गोष्ट लावू नये. मी तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याकडून एक मोठी निशाणीपण घेऊन आलो आहे[८]. म्हणून तू बनी इस्त्राईलास माझ्याबरोबर पाठवून दे[९] (१०५)

१) या महावाक्यांत अल्लाहतआलाने, पहिले हे सांगितले आहे की, ईमान आणि ईशभय अशी गोष्ट आहे की, ज्या वस्तीचे लोक त्याला स्वीकारतील तर त्यांच्यावर अल्लाहतआला आकाश आणि पृथ्वीचे बरकतीचे दरवाजे उघडून देतो. म्हणजे आवश्यकतेप्रमाणे त्यांना आकाशांतून पाऊस मिळवून देतो. आणि जमिन त्याच्याने तृप्त होऊन खूप उत्पन्न देते. परिणामत: सुखसमृद्धी आणि विपुलता यांच्या नशिबी येते. परंतु याच्याउलट पाखंड आणि कुफ्रचा मार्ग

स्वीकारल्यानंतर लोक अल्लाहच्या शिक्षेला पात्र ठरून जातात. मग ठाऊक नसते की, रात्र दिवसाच्या कोणत्या घटकेत शिक्षा येऊन जाईल; आणि हसत्या खेळत्या वस्त्यांना क्षणभरात खंडर बनवून टाकेल. यासाठी अल्लाहच्या या प्रयुक्तींनी निर्भय होता कामा नये. या निर्भयतेचा परिणाम घाट्याशिवाय आणखी काही नाही 'मकर' च्या भावार्थाच्या स्पष्टीकरणासाठी पहावे सू.आले इमरान आ.५४ चा समास.

२) म्हणजे पापांच्या परिणामात अजाबच येत नाही, तर अंत:करणाला पण कुलुपे लागून जातात. मग मोठे मोठे अजाबपण त्यांना लापरवाहिच्या निद्रेतून जागे करू शकत नाही. दुसऱ्या अन्य ठिकाणाप्रमाणे येथेपण अल्लाहतआलाने एक तर हे सांगितले आहे की, ज्याप्रमाणे आम्ही पूर्वी होऊन गेलेल्या लोकांना त्यांच्या गुन्ह्यांच्या परिणामांत नष्ट केले; आम्ही इच्छेले तर तुम्हाला सुद्धा, तुमच्या कर्तृत्वामुळे नष्ट करून टाकू. आणि दुसरी गोष्ट ही सांगितली की, सतत गुन्हा केल्यामुळे लोकांच्या अंत:करणावर मोहोर लावून दिली जाते.ज्याचा परिणाम हा होतो की, सत्त्याच्या आवाजासाठी त्यांचे कान बंद होऊन जातात. मग हितोपदेश आणि धार्मिक प्रवचन त्यांच्यासाठी बेकार होऊन जातात.

३) ज्याप्रमाणे मागच्या पृष्ठांत काही पैगंबराचे वर्णन येऊन गेले. 'बय्यनात' ने अभिप्रेत निशाण्या प्रमाणे आणि चमत्कार दोन्ही आहेत. उद्देश्य हा आहे की, पैगंबराच्या मार्फत जोपर्यंत आम्ही तर्क पूर्ण करून दिला नाही, आम्ही त्यांना नष्ट केले नाही, कारण की, ''जोपर्यंत आम्ही पैगंबर पाठवून देत नाही, शिक्षा अवतरीत करीत नाही.'' (सू. बनी इस्त्राईल - १५)

४) याचा एक भावार्थ तर हा आहे की, वचन आणि कराराच्या दिवशी, जेव्हा यांच्याकडून वचन घेण्यात आले होते, तर तेव्हा ते अल्लाहच्या ज्ञानात ईमान आणणारे नव्हते. म्हणून यांच्याजवळ जेव्हा पैगंबर आले, तर अल्लाहच्या ज्ञानाप्रमाणे त्यांनी ईमान आणले नाही. कारण की, त्यांच्या नशिबांतच ईमान नव्हते. जेव्हा अल्लाहने आपल्या ज्ञानाप्रमाणे लिहून दिले होते. ज्याला हदीसमध्ये, 'फकुल्लुम मुयस्सरून लिमा खुलिक लहु'' ने सांगण्यात आले आहे. (स.बुखारी तफसीर सू.लैल) दुसरा भावार्थ हा आहे की, जेव्हा पैगंबर त्यांच्याजवळ आले, तर ते या कारणाने त्यांच्यावर ईमान आणले नाही की, त्यांनी यापूर्वी सत्त्याला नाकारले होते, जणू सुरवातीलाच ज्या गोष्टीला ते नाकारून चुकले होते; हाच अपराध त्यांचे ईमान न आणण्याला कारणीभूत बनून गेला आणि ईमान आणण्याची सुबुद्धी यांच्याकडून हिराऊन घेण्यात आली. याला पुढच्या महावाक्यात, मोहोर लागण्याने निर्देशीत करण्यात आले आहे. ''आणि तुम्हांस काय ठाऊक आहे हे तर असे (दुर्भागी) आहेत की, यांच्याजवळ जरी निशाण्यापण येऊन गेल्यात, तरी सुद्धा ईमान आणणार नाही. आणि आम्ही त्यांच्या अंत:करणांना आणि डोळ्यांना उलटवून देऊ (तर) जसे ह्यांनी या कुरआनावर पहिल्या वेळेस ईमान आणले नाही. (तसे पुन्हा आणणार नाही)'' (सू. अन्आम - १०९-११०)

५) याच्याने काहींनी अहेदे अलस्त (काय मी तुमचा पालनकर्ता नाही?) जो आत्म्यांच्या जगात घेतला गेला होता; काहींनी शिक्षा टाळण्याकरीता पैगंबराबरोबर जे वचन देत असत; ते वचन; काहींनी सर्वसाधारण वचन अभिप्रेत धरले आहे. जे आपसात एक दुसऱ्यांबरोबर करीत असत. आणि हा वचनभंग , मग तो कोणत्याही प्रकारचा असो, आज्ञाभंगच आहे.

६) येथून ह.मूसा عليه السلام चे वर्णन सुरू होत आहे, जे उल्लेख केलेल्या पैगंबरांच्या नंतर आले; जे मोठ्या शानवाले पैगंबर होते. ज्यांना इजिप्तच्या फिरऔन आणि त्याच्या लोकांकडे प्रमाणे आणि चमत्कार देऊन, पाठविण्यात आले होते.

७) म्हणजे त्यांना बुडवून टाकण्यात आले; जसे की पुढे येईल.

८) जो या गोष्टीचा पुरावा आहे की, मी खरोखर अल्लाहकडून नेमणूक केलेला पैगंबर आहे. हा चमत्कार आणि मोठ्या निशाण्यांचा तपशिलपण पुढे येत आहे.

९) बनी इस्त्राईल, ज्यांचे मूळ निवासस्थान सीरियाचा इलाखा होता. हजरत यूसुफ عليه السلام च्या काळात, इजिप्तला चालले गेले होते. मग तेथलेच होऊन राहिले. फिरऔनने त्यांना गुलाम बनवून ठेवले होते. आणि त्यांच्यावर तऱ्हेतऱ्हेचे अत्याचार करीत असे. ज्याचा तपशिल पूर्वी सू.बकर मध्ये येऊन गेला आहे. आणि पुढेपण येईल. फिरऔन आणि त्याचे दरबारी उमराव, ने जेव्हा ह.मूसा عليه السلام च्या आवाहनाला धुडकावून लावले, तेव्हा ह.मूसा عليه السلام नी फिरऔन जवळ ही दुसरी मागणी केली की, बनी इस्त्राईलला स्वतंत्र करून द्यावे; कारण की त्यांनी आपल्या वडिलोपार्जित राहण्याचे जागेत जाऊन, मानसन्मानांचे आणि प्रतिष्ठीत जीवन जगावे आणि अल्लाहची उपासना करावी.

قَالَ اِنۡ كُنۡتَ جِئۡتَ بِاٰيَةٍ فَاۡتِ بِهَاۤ اِنۡ كُنۡتَ مِنَ الصّٰدِقِيۡنَ ﴿١٠٦﴾

**फिरऔनाने म्हटले की, जर तुम्ही कोणी चमत्कार घेऊन आला आहांत, तर त्याला आता दाखवा, जर तुम्ही खरे आहांत (१०६)**

فَاَلۡقٰى عَصَاهُ فَاِذَا هِىَ ثُعۡبَانٌ مُّبِيۡنٌ ﴿١٠٧﴾

**यावर त्यांनी आपली काठी टाकून दिली; तर अचानक ती एक धडधडीत अजगर बनून गेली (१०७)**

وَّنَزَعَ يَدَهٗ فَاِذَا هِىَ بَيۡضَآءُ لِلنّٰظِرِيۡنَ ﴿١٠٨﴾

**आणि आपला हात बाहेर काढला, तर तो अचानक सर्व पाहणाऱ्यांच्या समक्ष शुभ्र चकचकीत होऊन गेला[१] (१०८)**

قَالَ الۡمَلَاُ مِنۡ قَوۡمِ فِرۡعَوۡنَ اِنَّ هٰذَا لَسٰحِرٌ عَلِيۡمٌ ﴿١٠٩﴾

**फिरऔनाच्या लोकांत, जे सरदार लोक होते, त्यांनी म्हटले, खरोखर हा मनुष्य मोठा वस्ताद जादूगार आहे[२] (१०९)**

يُّرِيۡدُ اَنۡ يُّخۡرِجَكُمۡ مِّنۡ اَرۡضِكُمۡ‌ۚ فَمَاذَا تَاۡمُرُوۡنَ ﴿١١٠﴾

**तो इच्छितो की तुम्हास तुमच्या मुलखातून बाहेर करून द्यावे; तर आता तुम्ही लोक काय सल्ला देता? (११०)**

قَالُوۡۤا اَرۡجِهۡ وَاَخَاهُ وَاَرۡسِلۡ فِى الۡمَدَآٮِٕنِ حٰشِرِيۡنَ ﴿١١١﴾

**त्यांनी सांगितले की, तुम्ही त्यांना आणि त्यांच्या भावाला थांबवून ठेवा; आणि शहरांत हरकाऱ्यांना पाठवून द्या (१११)**

يَاۡتُوۡكَ بِكُلِّ سٰحِرٍ عَلِيۡمٍ ﴿١١٢﴾

**की, ते सर्व वस्ताद जादूगीरांस, आपल्याजवळ आणून हजर करून देतील[३] (११२)**

وَجَآءَ السَّحَرَةُ فِرۡعَوۡنَ قَالُوۡۤا اِنَّ لَـنَا لَاَجۡرًا اِنۡ كُنَّا نَحۡنُ الۡغٰلِبِيۡنَ ﴿١١٣﴾

**आणि ते जादूगीर फिरऔनाजवळ हजर झाले; (आणि) म्हणू लागले की, जर आम्ही प्रबळ राहिलो, तर आम्हाला कोणी मोठे बक्षीस मिळेल? (११३)**

قَالَ نَعَمۡ وَاِنَّكُمۡ لَمِنَ الۡمُقَرَّبِيۡنَ ﴿١١٤﴾

**फिरऔनने म्हटले की, होय आणि तुम्ही जवळ केलेल्या लोकांत होऊन जाल[४] (११४)**

१) म्हणजे अल्लाहतआलाने जे दोन मोठे चमत्कार त्यांना दिले होते; आपल्या सत्यतेसाठी त्यांना दाखवून दिले.

२) चमत्कार पाहिल्यानंतर ईमान आणण्याच्या ऐवजी फिरऔनच्या दरबारी मंडळीने त्यांना जादू ठरवून हे सांगून दिले की हा तर मोठाच वस्ताद जादूगीर आहे. ज्याच्याने त्याचा उद्देश तुमच्या सत्तेला उलथून टाकणे आहे. कारण की ह.मूसा عليه السلام च्या काळांत जादूचा फार जोर आणि तिचे सर्वदूर चलन होते. म्हणून ते चमत्कारांना पण जादू समजले. ज्यांत (म्हणजे चमत्कारात) सुरवातीपासूनच माणसाची पोहोच नसते. निव्वळ अल्लाहच्या मर्जीने जाहीर केले जातात. तथापि या विषयाने फिरऔनच्या दरबारी मंडळीसाठी फिरऔनला बहकविण्याची संधी मिळून गेली.

३) ह.मूसा عليه السلام च्या काळांत जादूगिरीला फार उत्कर्षावस्था होती. याचकरीता ह.मूसा عليه السلام नी सादर केलेल्या चमत्कारांनापण त्यांनी जादू समजली. आणि जादूच्याच मार्फत यांची तोड करण्याचे मनसुबे त्यांनी रचले. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, की फिरऔन आणि त्याच्या दरबारी लोकांनी सांगितले, ''हे मूसा عليه السلام काय तू इच्छितोस की, आपल्या जादूच्या जोरावर आम्हास आमच्या भूमितून काढून द्यावे. तर मग आम्ही सुद्धा याचसारख्या जादू तुझ्या मुकाबल्यात आणू. यासाठी कोण्या सपाट मैदानाचा आणि वेळेचा (कार्यक्रम) आम्ही निश्चित करून घ्यावा; ज्याचे दोघा (पक्षा) नी पालन करावे; ह.मूसा عليه السلام नी सांगितले की, नवरोज चा दिवस आणि चाश्तची वेळ आहे, या अनुषंगाने की लोकांनी जमा होऊन जावे.'' (सू. ताहा ५७-५९)

४) जादूगीर कारण की, इहलोकाचे इच्छुक होते, दुनिया कमविण्यासाठीच हातचलाखीची कला शिकत असत. म्हणून त्यांनी प्रसंगाला कमविण्याचे साधन जाणून की यावेळी बादशाहला आमची आवश्यकता अत्यंत निकडीची झाली आहे; तर का म्हणून या संधीचा फायदा घेऊन जास्त मेहनताना प्राप्त करून न घ्यावा? म्हणून त्यांनी यश मिळाल्यास मेहनतान्याची मागणी पुढे करून दिली. ज्यावर फिरऔनाने म्हटले, मेहनतानाच नाही, परंतु तुम्ही माझ्या जवळ केलेल्या लोकांत पण शामील होऊन जाल.

قَالُوْا يٰمُوْسٰٓى اِمَّآ اَنْ تُلْقِيَ وَاِمَّآ اَنْ نَّكُوْنَ نَحْنُ الْمُلْقِيْنَ ﴿١١٥﴾

**त्या जादूगारांनी म्हटले की हे मूसा! पाहिजे तर तुम्ही टाका आणि किंवा आम्हीच टाकू**[१] ११५

قَالَ اَلْقُوْا ۚ فَلَمَّآ اَلْقَوْا سَحَرُوْٓا اَعْيُنَ النَّاسِ وَاسْتَرْهَبُوْهُمْ وَجَآءُوْ بِسِحْرٍ عَظِيْمٍ ﴿١١٦﴾

**(मूसा अ.) म्हटले की, तुम्हीच टाका**[२]**. मग जेव्हा त्यांनी टाकले तर लोकांची नजरबंदी करून दिली आणि त्यांच्यावर दहशत घालून दिली. आणि एक प्रकारचा मोठा जादू (करून) दाखविला**[३] ११६

وَاَوْحَيْنَآ اِلٰى مُوْسٰٓى اَنْ اَلْقِ عَصَاكَ ۚ فَاِذَا هِيَ تَلْقَفُ مَا يَاْفِكُوْنَ ﴿١١٧﴾

**आणि आम्ही मूसाला आज्ञा दिली की तुम्ही आपली काठी टाकून द्या; तर काठीचे टाकणे होते की, तिने त्यांचे सर्व झुटमुटचे खेळाला गिळणे सुरु केले**[४] ११७

فَوَقَعَ الْحَقُّ وَبَطَلَ مَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿١١٨﴾

**तर सत्य जाहीर होऊन गेले; आणि त्यांनी जे काही बनविले होते, सर्व चालले गेले** ११८

فَغُلِبُوْا هُنَالِكَ وَانْقَلَبُوْا صٰغِرِيْنَ ﴿١١٩﴾

**तर ते लोक या प्रसंगी हारून गेले आणि फारच क्षुल्लक होऊन गेले** ११९

وَاُلْقِيَ السَّحَرَةُ سٰجِدِيْنَ ﴿١٢٠﴾

**आणि ते जे जादूगार होते, सजद्यांत पडून गेले** १२०

قَالُوْٓا اٰمَنَّا بِرَبِّ الْعٰلَمِيْنَ ﴿١٢١﴾

**म्हणू लागले, आम्ही ईमानआणले सकल जगाच्या पालनकर्त्यावर**[५] १२१

رَبِّ مُوْسٰى وَهٰرُوْنَ ﴿١٢٢﴾

**जो मूसा आणि हारूनचा पण पालनकर्ता आहे**[६] १२२

१) जादूगिरांनी हा अधिकार स्वत:वर पूर्ण खात्री असण्याच्या कारणाने दिला. त्यांना पूर्ण भरोसा होता की, आमच्या जादूच्या मुकाबल्यांत मूसाचा चमत्कार, ज्याला ते एक हातचलाखी समजत होते, काही महत्त्व ठेवत नाही. आणि जर मूसाला पहिले आपले कर्तृत्व दाखविण्याची संधी देऊन जरी दिली, तर त्याच्याने काही विशेष फरक पडणार नाही. आम्ही त्याच्या करतबची तोड, कुठल्याही स्वरूपांत प्राप्त करून घेऊ.

२) परंतु ह.मूसा عليه السلام कारण की, अल्लाहचे पैगंबर होते, आणि अल्लाहचे समर्थन त्यांना प्राप्त होते, म्हणून त्यांना अल्लाहच्या मदतीचा विश्वास होता. म्हणून त्यांनी कुठल्याही भीती आणि दिरंगाई शिवाय, जादूगिरांना सांगितले की, प्रथम तुम्ही जे दाखवू इच्छितात, दाखवा ! याशिवाय याच्यात ही युक्तीपण असूशकते, की जादूगिरांनी सादर केलेल्या जादूची तोड जेव्हा ह. मूसा عليه السلام कडून चमत्काराच्या रूपांत सादर होईल, तर हे लोकांसाठी जास्त परिणामकारक होईल. ज्याच्याने त्यांचे खरेपण जास्त स्पष्ट होईल आणि लोकांना ईमान आणणे सोपे होऊन जाईल.

३) काही आसार मध्ये (सहाबा رضي الله عنه चे कौल) दाखविण्यात आले आहे की, हे जादूगीर ७० हजारच्या संख्येत होते. उघडरीत्या ही संख्या अतिशयोक्तीने खाली नाही. ज्याच्यातून प्रत्येकाने एक एक दोरी आणि एक एक काठी मैदानात फेकली. जी पाहणाऱ्यांना धावत असलेली जाणवत होती. हा जणू. त्यांच्या जवळ फार मोठा जादू होता; जो त्यांनी सादर केला.

४) परंतु हे जे काही पण होते. काल्पनिक स्वरूप, हातचलाखी आणि जादू होती. जे वास्तविकतेचा सामना करूशकत नव्हते. म्हणून मूसा عليه السلام च्या काठी टाकण्या बरोबर सर्व काही संपून गेले आणि काठीने एक भयानक अजगराचे स्वरूप धारण करून सर्वांना गिळून घेतले.

५) जादूगिरांनी जी जादूची कला आणि तिच्या हकीकतीला जाणत होते; हे पाहिले तर समजून गेले की, मूसा عليه السلام नी जे काही येथे सादर केले आहे; जादू नाही. हा खरोखर अल्लाहचा प्रतिनिधी आहे. आणि अल्लाहच्या मदतीनेच याने हा चमत्कार सादर केला आहे. ज्याने एका क्षणांत आमच्या करतबावर पाणी फेरून दिले आहे. म्हणून त्यांनी मूसा عليه السلام वर ईमान आणल्याचे जाहीर करून टाकले. ही गोष्ट स्पष्ट झाली खोटे तर खोटे आहे, मग यावर किती तरी सुंदर आच्छादने घातली जावी. आणि सत्य तर सत्य आहे, मग पाहिजे तर त्याच्यावर कितीही पडदे टाकले जावे. तरीही सत्याचा डंका वाजूनच राहतो.

६) सजद्यांत पडून त्यांनी सकल जगाच्या पालनकर्त्यावर ईमान आणल्याचे जाहीर केले. ज्याच्याने फिरऔनींना असे वाटले असते की, हा सजदा फिरऔनला केला गेला आहे. ज्याचे उपास्य होण्याचे ते मानत असत. म्हणून त्यांनी (जादूगिरांनी) मूसा आणि हारूनचा पालनकर्ता म्हणून स्पष्ट करून दिले की हा सजदा आम्ही सकल जगाच्या पालनकर्त्यालाच करीत आहोत. लोकांनी स्वत: निर्माण केलेल्या कोण्या 'रब' ला (पालनकर्ता) नाही.

قَالَ فِرْعَوْنُ اٰمَنْتُمْ بِهٖ قَبْلَ اَنْ اٰذَنَ لَكُمْ ۚ اِنَّ هٰذَا لَمَكْرٌ مَّكَرْتُمُوْهُ فِی الْمَدِیْنَةِ لِتُخْرِجُوْا مِنْهَاۤ اَهْلَهَا ۚ فَسَوْفَ تَعْلَمُوْنَ ﴿١٢٣﴾

**फिरऔन म्हणू लागला की, तुम्ही मूसावर ईमान आणले आहे, याच्यापूर्वी की मी तुम्हांस याची परवानगी द्यावी. नि:संशय हे कारस्थान होते. हे कारस्थान तुम्ही या शहरामध्ये घडवले. कारण की तुम्ही या शहरातून येथे राहणाऱ्यांना बाहेर काढून द्यावे;तर मग आता तुम्हास माहित[१] होऊन जाईल (१२३)**

لَاُقَطِّعَنَّ اَیْدِیَكُمْ وَ اَرْجُلَكُمْ مِّنْ خِلَافٍ ثُمَّ لَاُصَلِّبَنَّكُمْ اَجْمَعِیْنَ ﴿١٢٤﴾

**मी तुमचे एकीकडचे हात आणि दुसरीकडचे पाय कापून टाकीन. मग तुम्हा सर्वांस सुळावर टांगून देईन[२] (१२४)**

قَالُوْۤا اِنَّاۤ اِلٰی رَبِّنَا مُنْقَلِبُوْنَ ﴿١٢٥﴾

**त्यांनी उत्तर दिले की, आम्ही (मरून) आपल्या मालकाकडेच जाऊ[३] (१२५)**

وَ مَا تَنْقِمُ مِنَّاۤ اِلَّاۤ اَنْ اٰمَنَّا بِاٰیٰتِ رَبِّنَا لَمَّا جَآءَتْنَا ؕ رَبَّنَاۤ اَفْرِغْ عَلَیْنَا صَبْرًا وَّ تَوَفَّنَا مُسْلِمِیْنَ ﴿١٢٦﴾

**आणि तू आमच्यात काय दोष पाहिला आहेस, याच्याशिवाय की, आम्ही आमच्या पालनकर्त्याच्या आदेशावर ईमान घेऊन आलो; जेव्हा[४] ते आमच्याजवळ आले. हे आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर धैर्याचा वर्षाव कर[५]. आणि आमचे प्राण मुसलमान असतानाच हरण कर[६] (१२६)**

وَ قَالَ الْمَلَاُ مِنْ قَوْمِ فِرْعَوْنَ اَتَذَرُ مُوْسٰی وَ قَوْمَهٗ لِیُفْسِدُوْا فِی الْاَرْضِ وَ یَذَرَكَ وَ اٰلِهَتَكَ ؕ قَالَ سَنُقَتِّلُ اَبْنَآءَهُمْ وَ نَسْتَحْیٖ نِسَآءَهُمْ ۚ وَ اِنَّا فَوْقَهُمْ قٰهِرُوْنَ ﴿١٢٧﴾

**आणि फिरऔनाच्या लोकांच्या सरदारांनी सांगितले की काय तुम्ही मूसा आणि त्यांच्या लोकांना असेच राहू द्याल, की त्यांनी मुलुखात फिसाद करत फिरावे[७]; आणि त्यांनी तुम्हास आणि तुमच्या उपास्य (देवतास) सोडून द्यावे?[८] फिरऔनाने म्हटले की, आम्ही आता या लोकांच्या मुलांना ठार करणे सुरू करून देऊ; आणि स्त्रियांना जिवंत राहू देऊ; आणि आम्ही त्यांच्यावर हर प्रकारे बलवान आहोत. [९] (१२७)**

قَالَ مُوْسٰی لِقَوْمِهِ اسْتَعِیْنُوْا بِاللّٰهِ وَ اصْبِرُوْا ۚ اِنَّ الْاَرْضَ لِلّٰهِ ۙ۫ یُوْرِثُهَا مَنْ یَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ ؕ وَ الْعَاقِبَةُ لِلْمُتَّقِیْنَ ﴿١٢٨﴾

**मूसाने आपल्या लोकांना सांगितले, अल्लाहतआलाची मदत मागा; आणि सहन करा. ही धरती अल्लाहतआलाची आहे; आपल्या सेवकातून ज्याला इच्छिल, (त्याला) तो मालक बनवून देईन आणि शेवटी यश त्यांनाच मिळते, जे अल्लाहला भितात[१०] (१२८)**

قَالُوْۤا اُوْذِیْنَا مِنْ قَبْلِ اَنْ تَاْتِیَنَا وَ مِنْۢ بَعْدِ مَا جِئْتَنَا ؕ قَالَ عَسٰی رَبُّكُمْ اَنْ یُّهْلِكَ عَدُوَّكُمْ وَ یَسْتَخْلِفَكُمْ فِی الْاَرْضِ فَیَنْظُرَ كَیْفَ تَعْمَلُوْنَ ﴿١٢٩﴾

**ते म्हणू लागले की, आम्ही तर नेहमी त्रासांतच राहिलो; आपल्या येण्यापूर्वी सुद्धा[११]; आणि आपल्या आल्यानंतर सुद्धा[१२] मूसाने सांगितले की, फारच लवकर अल्लाह तुमच्या शत्रूला नष्ट करून टाकीन आणि त्यांच्या ऐवजी तुम्हाला या मुलुखाचा मालक बनवून देईल; मग पाहील तुम्ही कस कशी कृत्ये करतात? [१३] (१२९)**

وَ لَقَدْ اَخَذْنَاۤ اٰلَ فِرْعَوْنَ بِالسِّنِیْنَ وَ نَقْصٍ مِّنَ الثَّمَرٰتِ لَعَلَّهُمْ یَذَّكَّرُوْنَ ﴿١٣٠﴾

**आणि आम्ही फिरऔनवाल्यांना दुष्काळाने फळांच्या कमी उत्पन्नांने पिडले की, त्यांनी समजून जावे[१४] (१३०)**

فَاِذَا جَآءَتْهُمُ الْحَسَنَةُ قَالُوْا لَنَا هٰذِهٖ ۚ وَ اِنْ تُصِبْهُمْ سَیِّئَةٌ یَّطَّیَّرُوْا بِمُوْسٰی وَ مَنْ مَّعَهٗ ؕ اَلَاۤ اِنَّمَا طٰٓىِٕرُهُمْ عِنْدَ اللّٰهِ وَ لٰكِنَّ اَكْثَرَهُمْ لَا یَعْلَمُوْنَ ﴿١٣١﴾

**मग जेव्हा त्यांच्यावर सुबत्ता येऊन जाई, तर मग म्हणत की हे तर आमच्यासाठी व्हावयासच पाहिजे; आणि जर त्यांना वाईट स्थितीचा सामना करावा लागे, तर तिला मूसा आणि त्याच्या लोकांचे अवलक्षण समजत[१५]. लक्षात ठेवा की, त्यांचे अवलक्षण अल्लाहच्या ज्ञानांत आहे[१६]. परंतु बहुतेक लोक याला समजत नाही (१३१)**

१) हे जे काही झाले, फिरऔनसाठी हैराण करणारे आणि आश्चर्यात टाकणारे होते. म्हणून त्याला तर काही सुचले नाही. त्याने हेच सांगून दिले की, तुम्ही आपसात मिळालेले आहांत आणि याचा उद्देश आमच्या सत्तेला संपवून टाकणे आहे. बरे! याचा परिणाम लवकरच तुम्हास माहित होऊन जाईल.

२) म्हणजे उजवा पाय आणि डावा हात किंवा डावा पाय आणि उजवा हात. मग फक्त हेच नाही, तर सुळावर चढवून तुम्हास, धडा घेण्याची निशाणी सुद्धा बनवून टाकेन.

३) याचा एक भावार्थ तर हा आहे की, जर तूआमच्या बरोबर असा मामला करशील, तर तुला सुद्धा या गोष्टीसाठी

तयार राहिले पाहिजे की, कयामतच्या दिवशी, अल्लाहतआला तुला या अपराधाची सख्त शिक्षा देईन. यासाठी की आम्हा सर्वांना मरून त्याच्याजवळ जाणे आहे. त्याच्या शिक्षेपासून कोण वाचूशकतो? जणू फिरऔनच्या या जगांतील शिक्षेच्या मुकाबल्यात त्याला परलोकातील शिक्षेपासून भिवविले गेले आहे. दुसरा भावार्थ हा आहे की, मृत्यू तर आम्हाला नक्कीच येणार आहे. यात काय फरक पडतो की, मृत्यू सुळावर येवो किंवा कोण्या आणखी रीतीने?

४) म्हणजे तुझ्याजवळ आमचा हाच दोष आहे; ज्यावर तू आमच्याशी नाराज होऊन गेला आहेस. आणि आम्हास शिक्षा देण्यावर, अडून बसला आहे. वास्तविक पाहता हा मुळांत दोषच नाही, हा तर चांगुलपणा आहे, फार मोठा चांगुलपणा की जेव्हा वस्तुस्थिती आमच्या समोर स्पष्ट होऊन गेली, तर आम्ही तिच्या तुलनेत सर्व ऐहिक फायद्यांना धुडकावून लावले; आणि वस्तुस्थितीचा स्वीकार केला. मग त्यांनी आपल्या बोलण्याचा रूख, फिरऔनकडून फिरवून अल्लाहकडे करून घेतला आणि त्याच्या दरबारात दुआसाठी हात उचलले.

५) कारण की आम्ही तुझ्या शत्रुच्या शिक्षेला सहन करून घ्यावे. आणि सत्त्यात अडून रहावे; आणि ईमानावर दृढ जमून रहावे.

६) या ऐहिक कसोटीने, आमच्यात ईमानापासून फिरून जाणे न येवो तसेच आणखी कोण्या फितन्यात (फिसाद) आम्ही व्यस्त होऊ नये.

७) ही प्रत्येक काळातील फिसादीची पद्धत राहिली आहे की, ते अल्लाहवाल्यांना फिसादी आणि त्यांच्या ईमान आणि एकेश्वरवादाच्या आवाहनाला फसाद म्हणतात. फिरऔनीने पण हेच म्हटले.

८) फिरऔनला पण जरी 'रब' होण्याचा दावा होता, (अना रब्बकुमुल आअ्ला ''मी तुमचा मोठा रब आहे.'' तो म्हणत असे.) परंतु दुसरे छोटे छोटे उपास्य पण होते. ज्यांच्या मार्फत लोक फिरऔनचे सामिप्य प्राप्त करीत असत.

९) आमच्या या व्यवस्थेत हे अडथळा आणूशकत नाही. मुलांना ठार करण्याचा हा कार्यक्रम दुसऱ्यादा फिरऔनींच्या सांगण्यावरून बनविण्यात आला. याच्यापूर्वीपण जेव्हा ह.मूसा عليه السلام चा जन्म झालेला नव्हता. मूसा عليه السلام च्या जन्मानंतर त्यांना संपविण्याकरता त्याने बनी इस्त्राईलच्या नवीन जन्मलेल्या मुलांना ठार मारणे सुरू केले होते. अल्लाहतआलाने मूसा عليه السلام च्या जन्मानंतर त्यांना वाचविण्यासाठी ही युक्ती केली की, मूसा عليه السلام ला स्वत: फिरऔनच्या महालांत पोहचवून त्याच्या कुशीत त्यांचे पालन पोषण केले. 'फलिल्लाहिल मकरो जमीआ!'

१०) जेंव्हा फिरऔनकडून दुसऱ्यांदा या जुलुमाची सुरूवात झाली, तेव्हा मूसा عليه السلام नी आपल्या लोकांना अल्लाहची मदत प्राप्त करणे आणि सहनशिलता पत्करण्याला सांगितले. आणि सांत्वन केले की जर तुम्ही योग्य मार्गावर राहिले, तर मुलुखाची सत्ता सरतेशेवटी तुम्हालाच मिळेल.

११) हा इशारा आहे त्या जुलुमांकडे, जे मूसा عليه السلام च्या जन्मापूर्वी त्यांच्यावर होत राहिले.

१२) जादूगिरांच्या घटनेनंतर जुलूम आणि अत्याचारांचा हा नवीन क्रम आहे; जो मूसा عليه السلام च्या आल्यानंतर सुरू झाला.

१३) ह.मूसा عليه السلام नी सांत्वन केले की, घाबरू नका; लवकरच अल्लाहतआला तुमच्या शत्रुला नष्ट करून, मुलुखांत तुम्हाला सत्ता प्रदान करेल आणि मग तुमच्या कसोटीचा एक नवा क्रम चालू होईल. आतातर इजा पोंहचवून तुमची कसोटी घेण्यात येत आहे. मग बक्षीस व मान सन्मानाची वर्षा करून, आणि अधिकार आणि सत्ता प्रदान करून तुमची कसोटी घेण्यात येईल.

१४) आले फिरऔनने अभिप्रेत फिरऔनचे लोक आहेत. आणि 'सिनीन' ने दुष्काळ. म्हणजे पावसाच्या न पडण्याने आणि वृक्षांवर किडी वगैरे पडून जाण्याने, उत्पन्नांत कमतरता. या कसोटीचा उद्देश हा होता की, कदाचित् ते जुलुमापासून आणि अंहकारापासून परावृत्त होतील; ज्यांत ते व्यस्त होते.

१५) 'हसनतुन' (चांगलेपणा) ने अभिप्रेत, धनधान्य आणि फळफळावळांची विपुलता आणि 'सय्यअतुन' (वाईटपणा) ने अभिप्रेत याच्या उलट दुष्काळ आणि उत्पन्नात कमतरता, 'हसनतुन' चे सर्व क्रेडीट आपल्याकडे घेऊन घेत की, हे आमच्या कष्टाचे फळ आहे. आणि वाईट परिस्थितीला जबाबदार ह.मूसा عليه السلام आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांना ठरवीत; की हे तुमच्या अवलक्षणाचे परिणाम आमच्या मुलुखावर पडत आहेत.

१६) 'ताईर' चा अर्थ आहे, 'उडणारा' म्हणजे पक्षी. कारण की, पक्ष्यांच्या डाव्या किंवा उजव्या बाजूने उडण्याने, ते लोक शुभशकून किंवा बदशकून घेत असत. म्हणून ह्या शब्दाचा उपयोग शकून घेण्यासंबंधीपण होऊ लागला. आणि येथे हा याच अर्थांत उपयोगात आणला गेला आहे. अल्लाहतआलाने फर्माविले की, बरे किंवा वाईट जे सुबत्तेमुळे किंवा दुष्काळामुळे त्यांना वाटते. त्याची कारणे अल्लाहतआला कडून आहेत. मूसा عليه السلام आणि त्यांचे अनुयायी याला कारणीभूत नाही. 'ताईरो हुम इन्दल्लाह्' चा अर्थ होईल, अल्लाहकडून आहे आणि त्याचे कारण यांचे कुफ्र आहे.

وَقَالُوا مَهْمَا تَأْتِنَا بِهِ مِنْ آيَةٍ لِتَسْحَرَنَا بِهَا فَمَا نَحْنُ لَكَ بِمُؤْمِنِينَ ۝١٣٢

आणि असे म्हणत की, कशीही विचित्र गोष्ट आमच्यासमोर आणा, की तिच्यामुळे आमच्यावर जादू चालवावीस. तरी सुद्धा आम्ही तुमची गोष्ट कदापि मान्य करणार नाही[१] (१३२)

فَأَرْسَلْنَا عَلَيْهِمُ الطُّوفَانَ وَالْجَرَادَ وَالْقُمَّلَ وَالضَّفَادِعَ وَالدَّمَ آيَاتٍ مُفَصَّلَاتٍ فَاسْتَكْبَرُوا وَكَانُوا قَوْمًا مُجْرِمِينَ ۝١٣٣

मग आम्ही त्यांच्यावर तूफान पाठविले. आणि टोळ व उवा व बेडूक व रक्त की हे सर्व स्पष्ट स्पष्ट चमत्कार होते[२]. तर ते गर्व करीत राहिले, आणि ते लोक होते पण अपराधीच (१३३)

وَلَمَّا وَقَعَ عَلَيْهِمُ الرِّجْزُ قَالُوا يَا مُوسَى ادْعُ لَنَا رَبَّكَ بِمَا عَهِدَ عِنْدَكَ ۚ لَئِنْ كَشَفْتَ عَنَّا الرِّجْزَ لَنُؤْمِنَنَّ لَكَ وَلَنُرْسِلَنَّ مَعَكَ بَنِي إِسْرَائِيلَ ۝١٣٤

आणि जेव्हा त्यांच्यावर कोणी शिक्षा येऊन पडे, तर असे म्हणत की हे मूसा! आमच्यासाठी आपल्या पालनकर्त्याकडे, या गोष्टीची प्रार्थना कर, की जीचा त्याने तुमच्याशी करार करून ठेवला आहे की, जर आपण या शिक्षेला आमच्यावरून हटवून द्याल, तर आम्ही अवश्य अवश्य आपल्या सांगण्याने ईमान घेऊन येऊ; आणि आम्ही बनी इस्त्राईलला पण मुक्त करून, तुमच्या बरोबर पाठवून देऊ (१३४)

فَلَمَّا كَشَفْنَا عَنْهُمُ الرِّجْزَ إِلَىٰ أَجَلٍ هُمْ بَالِغُوهُ إِذَا هُمْ يَنْكُثُونَ ۝١٣٥

मग जेव्हा त्यांच्यावरून या शिक्षेला एका खास वेळेपर्यंत की तेथपर्यंत त्यांना ती पोंहचवयाची होती, आम्ही हटवून टाकू तर ते लगेच वचनभंग करू लागत[३] (१३५)

فَانْتَقَمْنَا مِنْهُمْ فَأَغْرَقْنَاهُمْ فِي الْيَمِّ بِأَنَّهُمْ كَذَّبُوا بِآيَاتِنَا وَكَانُوا عَنْهَا غَافِلِينَ ۝١٣٦

मग आम्ही त्यांच्याकडून बदला घेतला; म्हणजे त्यांना समुद्रात गर्क करून टाकले; या कारणाने की, ते आमच्या निशाण्यांस खोटे म्हणत होते;आणि त्याच्याकडे दुर्लक्ष करीत[४] होते (१३६)

وَأَوْرَثْنَا الْقَوْمَ الَّذِينَ كَانُوا يُسْتَضْعَفُونَ مَشَارِقَ الْأَرْضِ وَمَغَارِبَهَا الَّتِي بَارَكْنَا فِيهَا ۖ وَتَمَّتْ كَلِمَتُ رَبِّكَ الْحُسْنَىٰ عَلَىٰ بَنِي إِسْرَائِيلَ بِمَا صَبَرُوا ۖ وَدَمَّرْنَا مَا كَانَ يَصْنَعُ فِرْعَوْنُ وَقَوْمُهُ وَمَا كَانُوا يَعْرِشُونَ ۝١٣٧

आणि आम्ही त्या लोकांना की जे बिलकुल दुर्बल गणले जात होते[५], या जमिनीच्या पूर्व पश्चिमेचा मालक बनवून टाकले. ज्यात आम्ही बरकत ठेवली[६] आहे; आणि तुमच्या पालनकर्त्याचा चांगला वायदा बनी इस्त्राईलच्या पक्षात, त्यांच्या सहनशिलतेमुळे पूर्ण होऊन गेला[७]. आणि आम्ही फिरऔन आणि त्याच्या लोकांचे बनविलेले काम आणि उंच उंच इमारती सर्वांना उलट सुलट करून टाकले[८] (१३७)

وَجَاوَزْنَا بِبَنِي إِسْرَائِيلَ الْبَحْرَ فَأَتَوْا عَلَىٰ قَوْمٍ يَعْكُفُونَ عَلَىٰ أَصْنَامٍ لَهُمْ ۚ قَالُوا يَا مُوسَى اجْعَلْ لَنَا إِلَٰهًا كَمَا لَهُمْ آلِهَةٌ ۚ قَالَ إِنَّكُمْ قَوْمٌ تَجْهَلُونَ ۝١٣٨

आणि आम्ही बनी इस्त्राईलला समुद्राच्या पार पोहचवून दिले. मग त्या लोकांचे एका लोकसमूहावरून जाणे झाले; जे आपल्या काही मूर्तींना धरून बसले होते; म्हणू लागले हे मूसा! आमच्यासाठी पण एक असा उपास्य निश्चित करून द्या; जसे त्यांचे उपास्य आहेत. त्यांनी सांगितले की, खरोखर तुम्हा लोकात फारच अज्ञान आहे[९] (१३८)

إِنَّ هَٰؤُلَاءِ مُتَبَّرٌ مَا هُمْ فِيهِ وَبَاطِلٌ مَا كَانُوا يَعْمَلُونَ ۝١٣٩

हे लोक ज्या कामात लागले आहेत, ते नष्ट केले जाईल. आणि यांचे हे काम निव्वळ आधाराविना आहे[१०] (१३९)

قَالَ أَغَيْرَ اللَّهِ أَبْغِيكُمْ إِلَٰهًا وَهُوَ فَضَّلَكُمْ عَلَى الْعَالَمِينَ ۝١٤٠

सांगितले काय अल्लाहतआलाशिवाय आणखी कोणाला तुमचा उपास्य ठरवून देऊ? वास्तविक त्याने तुम्हास सकल जगाच्या लोकांवर श्रेष्ठत्व दिले आहे[११] (१४०)

---

१) हे याच कुफ्र आणि अहंकाराचे प्रदर्शन आहे; ज्यात ते व्यस्त होते; आणि चमत्कार आणि अल्लाहच्या निशाण्यांना आतासुद्धा ते जादूगिरी म्हणत होते किंवा ठरवत होते.

२) तुफानाने पूर किंवा अतिवृष्टी ज्याने प्रत्येक वस्तू बुडून गेली. किंवा भरपूर मृत्यू अभिप्रेत आहेत. ज्याने घरा घरात दु:खवठा निर्माण झाला. जराद टोळांना म्हणतात. टोळ धाडीचा हल्ला पिकांच्या बर्बादीसाठी प्रसिद्ध आहे. हे टोळ त्यांच्या फुले आणि फळांच्या पिकांना खाऊन चट करून टाकीत. 'कुम्मल' ने अभिप्रेत उवा आहेत, ज्या मनुष्यांचे शरीर, कपडे आणि केसांत होऊन जातात. किंवा धनोर आहे जे धान्याला लागून जातात. तर त्याच्या बऱ्याच भागाला संपवून

टाकतात. उवांमुळे माणसाला घृणा पण येते. आणि त्या जास्त झाल्यावर तर त्रास पण होतो. आणि जेव्हा हे शिक्षा म्हणून असेल, तिच्यामुळे होणाऱ्या त्रासाचा अंदाज केला जाऊ शकतो. त्याचप्रमाणे धनोराची शिक्षा पण धान्याला पोकळ करून देण्याला पुरेशी आहे. 'ज़फादेअ्', 'ज़फदअतुन' चे अनेकवचन आहे. हे बेडकाला म्हणतात. जे पाण्यात, तलावात, डबक्यात असतात. हे बेडूक त्यांच्या जेवणात बिछान्यात साठवलेल्या धान्यात म्हणजे प्रत्येक ठिकाणी आणि चोहीकडे बेडूकच बेडूक होऊन गेले. ज्याने त्यांचे खाणे, पिणे, झोपणे आणि विश्रांती घेणे कठीण होऊन गेले. 'दम्' (रक्त) ने अभिप्रेत आहे पाण्याचे रक्त बनून जाणे, अशा रीतीने पाणी पिणे त्यांच्यासाठी अशक्य होऊन गेले. काहींनी रक्ताने अभिप्रेत घोळणा फुटण्याचा आजार घेतला आहे. म्हणजे प्रत्येक माणसाच्या नाकातून रक्त येऊ लागले. ''आयात मुफस्सलात'' हे स्पष्ट स्पष्ट आणि वेगवेगळे चमत्कार होते, जे थोड्या थोड्या काळानंतर त्यांच्याजवळ आले.

३) म्हणजे एक शिक्षा आली, तर तिच्याने त्रासून ह. मूसा ﷺ जवळ येत. त्यांच्या प्रार्थनेने ती टळून जाई; तर ईमान आणण्याच्या ऐवजी पुन्हा त्या कुफ्र आणि शिर्कवर जमून रहात. मग दुसरी शिक्षा येई. तर पुन्हाअसेच करत. असे काही काही अंतराने पाच शिक्षा त्यांच्यावर आल्यात. परंतु यांच्या मनांत, जी शिरजोरी आणि डोक्यांत जो गर्व होता; तो सत्याच्या मार्गात, त्यांच्या करता, आडकाठी बनून राहिला. आणि इतक्या साऱ्या स्पष्ट निशाण्या, पाहिल्यावर सुद्धा ते ईमानाच्या दौलतीपासून वंचित्‌च राहिले.

४) इतक्या मोठमोठ्या निशाण्या पाहून सुद्धा ते ईमान आणण्यासाठी झोपेतून जागे झाले नाहीत. सरतेशेवटी त्यांना समुद्रांत बुडवून टाकण्यात आले ज्याचा तपशिल कुरआन मजीदमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी आढळून येतो.

५) म्हणजे बनी इस्त्राईलला ज्यांना फिरऔनने गुलाम बनवून ठेवले होते, आणि त्यांच्यावर अत्याचार चालू ठेवला होता; यामुळे ते खरोखर इजिप्तमध्ये दुर्बल समजले जात असत. कारण की, ते आधिन आणि गुलाम होते. परंतु जेव्हा अल्लाहने इच्छिले, तर या अधिनस्थ आणि गुलाम लोकांना देशाचा वारसदार बनवून टाकले. ''ज्याला इच्छितो त्याला प्रतिष्ठा देतो आणि ज्याला इच्छितो त्याला अप्रतिष्ठीत (अपमानित) करतो.'' (सू. आलेइमरान - २६)

६) जमिनीने उद्देशीत सीरियाचा इलाखा पॅलेस्टाईन आहे. जेथे अल्लाहतआलाने अमालिका नंतर बनी इस्त्राईलला वर्चस्व दिले. सीरियामध्ये बनी इस्त्राईल ह. मूसा ﷺ व हारून ﷺ च्या मृत्यूनंतर त्यावेळेस गेले, जेव्हा ह. यूशा बिन नूनने अमालिकाला हरवून बनी इस्त्राईल करता मार्ग मोकळा करून दिला. आणि जमिनीच्या त्या भागात बरकती ठेवल्या; म्हणजे सीरियाच्या इलाख्यात. जे बहुसंख्य पैगंबरांचे निवासस्थळ, त्यांच्या दफन होण्याची जागा राहिली. आणि प्रत्यक्ष सुबत्ता आणि समृद्धतेसाठी पण प्रसिद्ध आहे. म्हणजे उघड आणि गुप्त दोन्ही प्रकारच्या बरकतींनी हा भूभाग समृद्ध राहिला आहे. मशारिक, मशरिकचे अनेकवचन आणि मगारीब, मगरीबचे अनेकवचन आहे. अनेकवचनाने अभिप्रेत आशीर्वादीत भूभागाचे पूर्वीय आणि पश्चिमी भाग आहेत; म्हणजे पूर्व व पश्चि भाग.

७) हा तोच वायदा आहे, जो यापूर्वी ह.मूसा ﷺ च्या मुखाने आ.१२८ ते १२९ मध्ये सांगण्यात आला आहे. आणि सू.कससमध्ये सुद्धा ''आम्ही इच्छितो की, त्यांच्यावर उपकार करावेत. जे देशात दुर्बळ समजले जातात; आणि त्यांना पुढारी बनवावे आणि देशाचे वारसदार बनवावे. आणि देशात त्यांना शक्ती व सामर्थ्य द्यावे. आणि फिरऔन व हामान, आणि त्यांच्या सैन्याला ती गोष्ट दाखवून द्यावी, जिला ते भितात.'' (सू. कसस्-५,६) आणि ही कृपा आणि उपकार त्या सहनशिलतेमुळे झाला, जो त्यांनी फिरऔनी अत्याचारांचा सामना करताना दाखविला.

८) 'मस्नुआत' ने संकेत कारखाने,इमारती आणि शस्त्रास्त्रे वगैरे आहेत. आणि 'यअरिशून' (जे ते उंच उभारित होते.) ने अभिप्रेत उंच उंच इमारती पण असू शकतात आणि द्राक्ष वगैरेंच्या बागा पण; जे ते छतांवर पसरवित असत. अर्थ हा आहे की, त्यांच्या शहरी इमारती, शस्त्रे आणि दुसरा सामानपण नष्ट करून टाकण्यांत आला; आणि त्यांचे बाग पण.

९) याच्यापेक्षा जास्त अज्ञान आणि मूर्खपणा काय असेल की, ज्या अल्लाहने त्यांना फिरऔन सारख्या मोठ्या शत्रूपासून केवळ मुक्तता दिली नाही किंबहुना त्यांच्या डोळ्यादेखत, त्याला त्याच्या सैन्या समवेत बुडवून टाकले. आणि त्यांना चमत्कारिक पद्धतीने समुद्र पार करून दिला. ते समुद्र पार करतांच, त्या अल्लाहला विसरून दगडाचे स्वत: घडविलेले उपास्य शोधू लागले. असे म्हणतात की, या मूर्ती गायीच्या स्वरूपांत होत्या, ज्या दगडापासून बनविलेल्या होत्या.

१०) म्हणजे हे मूर्तींचे पुजारी, ज्यांच्या स्थितीने तुम्हाला पण फसवणुकीत टाकून दिले, त्यांच्या भाग्यात बर्बादी आणि त्यांचे हे काम निरर्थक आणि घाट्याला कारणीभूत आहे.

११) काय, ज्या अल्लाहने तुमच्यावर इतके उपकार केले, आणि तुम्हास सकल जगात श्रेष्ठत्वपण दिले; त्याला सोडून मी तुमच्यासाठी दगड आणि लाकडापासून घडविलेल्या मूर्ती शोधत बसू? म्हणजे हा कृतघ्नपणा आणि उपकारांना विसरणे, मी कसे बरे करूशकेन ? पुढच्या महावाक्यांत अल्लाहतआलाच्या आणखी उपकारांचा उहापोह आहे.

وَاِذْ اَنْجَيْنٰكُمْ مِّنْ اٰلِ فِرْعَوْنَ يَسُوْمُوْنَكُمْ سُوْٓءَ الْعَذَابِ ۚ يُقَتِّلُوْنَ اَبْنَآءَكُمْ وَيَسْتَحْيُوْنَ نِسَآءَكُمْ ؕ وَفِىْ ذٰلِكُمْ بَلَآءٌ مِّنْ رَّبِّكُمْ عَظِيْمٌ ﴿۱۴۱﴾

آणि ती वेळ आठवा, जेव्हा आम्ही तुम्हास फिरऔनवाल्यांपासून वाचवून घेतले; जे तुम्हास मोठ्या इजा पोहचवीत असत; तुमच्या पुत्रांना ठार करून टाकीत, आणि तुमच्या स्त्रियांना जिवंत सोडून देत. आणि याच्यात तुमच्या पालनकर्त्याकडून (तुमची) फार मोठी कसोटी होती[१] (१४१)

وَوٰعَدْنَا مُوْسٰى ثَلٰثِيْنَ لَيْلَةً وَّاَتْمَمْنٰهَا بِعَشْرٍ فَتَمَّ مِيْقَاتُ رَبِّهٖٓ اَرْبَعِيْنَ لَيْلَةً ۚ وَقَالَ مُوْسٰى لِاَخِيْهِ هٰرُوْنَ اخْلُفْنِىْ فِىْ قَوْمِىْ وَاَصْلِحْ وَلَا تَتَّبِعْ سَبِيْلَ الْمُفْسِدِيْنَ ﴿۱۴۲﴾

आणि आम्ही मूसाशी तीस रात्रींचा वायदा केला. आणि दहा रात्री आणखी वाढवून त्या रात्रीला पुरे करून टाकले. आणि त्यांच्या पालनकर्त्याचा वायदा पूर्ण चाळीस रात्रींचा होऊन गेला. आणि[२] मूसाने आपला भाऊ हारून यास सांगितले, माझ्या नंतर यांची व्यवस्था पहा; आणि त्यांच्यात सुधारणा करीत रहा; आणि फिसादखोर लोकांच्या मतावर अंमलबजावणी करू नकोस[३] (१४२)

وَلَمَّا جَآءَ مُوْسٰى لِمِيْقَاتِنَا وَكَلَّمَهٗ رَبُّهٗ ۙ قَالَ رَبِّ اَرِنِىْٓ اَنْظُرْ اِلَيْكَ ؕ قَالَ لَنْ تَرٰىنِىْ وَلٰكِنِ انْظُرْ اِلَى الْجَبَلِ فَاِنِ اسْتَقَرَّ مَكَانَهٗ فَسَوْفَ تَرٰىنِىْ ۚ فَلَمَّا تَجَلّٰى رَبُّهٗ لِلْجَبَلِ جَعَلَهٗ دَكًّا وَّخَرَّ مُوْسٰى صَعِقًا ۚ فَلَمَّآ اَفَاقَ قَالَ سُبْحٰنَكَ تُبْتُ اِلَيْكَ وَاَنَا اَوَّلُ الْمُؤْمِنِيْنَ ﴿۱۴۳﴾

आणि जेव्हा मूसा आमच्या वेळेवर येऊन पोहचेल; आणि त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्याशी गोष्टी केल्या, तर त्यांनी विनंती केली की, हे माझ्या पालनकर्त्या! आपले दर्शन मला करून द्या; की तुला एक नजर पाहून घ्यावे. सांगितले की, तू मला कधीच पाहू शकणार[४] नाहीस. परंतु तू या पर्वताकडे पहात रहा. तो जर आपल्या जागेवर कायम राहिला, तर तू सुद्धा मला पाहू शकशील. मग जेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने, पर्वतावर आपले जाज्वल्य स्वरूप प्रकट केले, त्याला चकनाचूर करून टाकले, आणि मूसा बेशुद्ध होऊन पडला[५]. मग जेव्हा शुद्धीवर आला, म्हणू लागला, निःसंशय तू पवित्र आहेस; मी तुझ्या हुजुरात पश्चात्ताप व्यक्त करतो; आणि मी सर्वांत पहिले त्याच्यावर विश्वास ठेवतो[६] (१४३)

قَالَ يٰمُوْسٰٓى اِنِّى اصْطَفَيْتُكَ عَلَى النَّاسِ بِرِسٰلٰتِىْ وَبِكَلَامِىْ ۖ فَخُذْ مَآ اٰتَيْتُكَ وَكُنْ مِّنَ الشّٰكِرِيْنَ ﴿۱۴۴﴾

(अल्लाहने) फर्माविले की, हे मूसा! मी पैगंबरी आणि माझ्याशी संभाषणाने आणखी लोकांतून तुला निवडून घेतले आहे, तर जे काही मी तुला दिले आहे त्याला घे आणि (माझे) आभार मान[७] (१४४)

وَكَتَبْنَا لَهٗ فِى الْاَلْوَاحِ مِنْ كُلِّ شَىْءٍ مَّوْعِظَةً وَّتَفْصِيْلًا لِّكُلِّ شَىْءٍ ۚ فَخُذْهَا بِقُوَّةٍ وَّاْمُرْ قَوْمَكَ يَاْخُذُوْا بِاَحْسَنِهَا ؕ سَاُورِيْكُمْ دَارَ الْفٰسِقِيْنَ ﴿۱۴۵﴾

आणि आम्ही काही तक्त्यांत प्रत्येक प्रकारचा उपदेश आणि प्रत्येक गोष्टीचा तपशील यांना लिहून दिला[८]. तुम्ही यांना घट्ट पकडून ठेवा; आणि आपल्या लोकांना आदेश द्या की, याला चांगल्या प्रकारे पकडून ठेवा.[९]; आता फारच लवकर मी तुम्हा लोकांना या आज्ञाभंजकाचे घर दाखवून देईल[१०] (१४५)

سَاَصْرِفُ عَنْ اٰيٰتِىَ الَّذِيْنَ يَتَكَبَّرُوْنَ فِى الْاَرْضِ بِغَيْرِ الْحَقِّ ؕ وَاِنْ يَّرَوْا كُلَّ اٰيَةٍ لَّا يُؤْمِنُوْا بِهَا ۚ وَاِنْ يَّرَوْا سَبِيْلَ الرُّشْدِ لَا يَتَّخِذُوْهُ سَبِيْلًا ۚ وَاِنْ يَّرَوْا سَبِيْلَ الْغَىِّ يَتَّخِذُوْهُ سَبِيْلًا ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمْ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا وَكَانُوْا عَنْهَا غٰفِلِيْنَ ﴿۱۴۶﴾

मी अशा लोकांना आपल्या आदेशापासून विमुखच राहू देईल, जे जगांत अहंकार करतात. ज्याचा त्यांना काही हक्क प्राप्त नाही. आणि जर सर्व निशाण्या पाहून घेतील तरी सुद्धा ते यावर ईमान आणणार नाही[११]. आणि जर हिदायतचा मार्ग पाहतील तर त्याला आपली पद्धत बनवणार नाही. आणि जर मार्ग भ्रष्टतेचा मार्ग पाहतील तर त्याला आपली पध्दत बनवून[१२] घेतील. हे या कारणाने आहे की, त्यांनी आमच्या निशाण्यांस खोटे म्हटले; आणि त्यांच्यापासून बेपर्वा राहिले[१३] (१४६)

१) या त्याच कसोट्या आहेत, ज्यांचा उल्लेख सू.बकर: मध्ये सुद्धा येऊन चुकला. आणि सू.इब्राहीम मध्ये सुद्धा येईल.

२) फिरऔन आणि त्याच्या लष्कराच्या गर्क झाल्यानंतर आवश्यकता भासू लागली की, बनी इस्त्राईलांच्या हिदायत आणि मार्गदर्शनाखाली कोणी पुस्तक त्यांना दिले जावे. म्हणून अल्लाहतआलाने ह.मूसा عليه السلام ला तीस रात्रींसाठी तूर पर्वतावर बोलाविले. ज्यात दहा रात्रींची वाढ करून त्यांना चाळीस रात्री करून देण्यात आल्या. ह. मूसा عليه السلام नी जातेवेळी ह.हारून عليه السلام ला जे त्यांचे भाऊपण होते, आणि पैगंबर सुद्धा आपल्या जागेवर नेमणूक करून दिली. कारण की त्यांनी बनी इस्त्राईलांच्या मार्गदर्शनाचे आणि सुधारणेचे काम करीत रहावे; आणि त्यांना प्रत्येक प्रकारच्या फसादापासून वाचवावे. या महावाक्यांत हेच वर्णन केले गेले आहे.

३) ह.हारून ﷺ स्वत: पैगंबर होते आणि सुधारणेचे काम त्यांच्या पदाच्या कर्तव्यांत शामील होते. ह. मूसा ﷺ नी त्यांना केवळ चर्चा आणि ताकीद म्हणून हे उपदेश केले. 'मीकात' ने येथे निश्चित कालावधी अभिप्रेत आहे.
४) जेव्हा मूसा ﷺ तूर पर्वतावर वर गेले, आणि अल्लाहने त्यांच्याशी जसे करावयास पाहिजे तसे संभाषण केले. तेव्हा ह.मूसा ﷺ च्या मनांत अल्लाहला पाहण्याची आवड निर्माण झाली. आणि आपल्या या आवडीचे प्रकटीकरण, 'रब्बे अरिनी' म्हणून केले, ज्याच्या उत्तरांत, अल्लाहतआलाने म्हटले की, 'लन तरानी' म्हणजे ''तू मला कधीच पाहू शकणार नाही.'' याने आधार घेऊन 'मुअतजला' ने म्हटले की, ''लन् नफी ताबीद्'' (नेहमीसाठी नकार) करिता येतो. म्हणून अल्लाहचे दर्शन न इहलोकांत शक्य आहे, न परलोकांत. परंतु 'मुअतजला' चा हा मसलक सहीह हदिशीच्या विरूद्ध आहे. क्रमश: सहीह आणि मजबूत रिवायतींनी सिद्ध आहे की, कयामतच्या दिवशी, ईमानवाले अल्लाहला पाहतील; आणि स्वर्गांत सुद्धाअल्लाहच्या दर्शनाने लाभान्वीत होतील. सर्व अहले सुन्नतची हीच श्रद्धा आहे. या 'दर्शनाला नकार' चा संबंध फक्त दुनियेशी आहे. या जगांत कोणी मानवी डोळे अल्लाहला पाहण्याला समर्थ नाहीत. परंतु परलोकांत अल्लाहतआला या डोळ्यांत एवढी शक्ती निर्माण करून देईल की ते अल्लाहतआलाच्या जाज्वल्याला सहन करू शकतील.
५) म्हणजे तो पर्वतपण रबच्या (अल्लाहच्या) जाज्वल्याला सहन करूशकला नाही. आणि ह. मूसा ﷺ बेशुद्ध होऊन खाली पडले. हदीसमध्ये येते की, कयामत च्या दिवशी सर्वलोक बेशुध्द होतील. ही बेशुध्दी इमाम इब्ने कसीरच्या म्हणण्याप्रमाणे हशरच्या मैदानांत, त्यावेळी होईल जेव्हा अल्लाहतआला निवाडे करण्यासाठी आपल्या शानसह अवतीर्ण होईल आणि जेव्हाशुद्धीवर येतील, तेव्हा मी शुद्धीवर येणाऱ्यांमध्ये पहिला माणूस असेल. मी पाहील की, मूसा ﷺ अर्षचा पाय धरून उभे आहेत. मला ठाऊक नाही ते माझ्यापूर्वी शुद्धीवर आले किंवा त्यांना तूर पर्वताच्या बेहोशीच्या बदल्यांत हशरच्या मैदानाच्या बेशुद्धी पासून वगळण्यात आले. (स.बुखारी व स.मुस्लीम)
६) तुझ्या महत्तेचा आणि जाज्वलचा आणि या गोष्टीचा की मी तुझा नम्र सेवक आहे. या जगांत तुझ्या दर्शनाला सहन करणारा होऊ शकत नाही.
७) ही संभाषणाची दुसरी वेळ होती. जिच्याने ह. मूसा ﷺ ला सन्मानित करण्यात आले. याच्यापूर्वी जेव्हा आग घेण्यास गेले होते, तेव्हा अल्लाहतआलाने संभाषणाने सन्मानीत केले होते. आणि पैगंबरी प्रदान केली होती.
८) जणू तौरात तक्त्यांच्या स्वरूपात देण्यात आले. ज्यात त्यांच्यासाठी धार्मिक आदेश करण्याचा आणि मना केलेल्या गोष्टी प्रोत्साहन व भयाचा पूर्ण तपशील होता.
९) म्हणजे सवलतीच्याच शोधात असू नये, जशी की सवलती पसंत करणाऱ्यांची स्थिती असते.
१०) मुकाम (घर) ने उद्देशित एक तर परिणाम म्हणजे नष्ट होणे आहे. किंवा याचा अर्थ आहे की, आज्ञाभंजकांच्या देशावर तुम्हाला सत्ता प्रदान करेन. आणि याच्याने अभिप्रेत सीरिया देश आहे; ज्यावर यावेळी अमालिकाची सत्ता होती. जे अल्लाहचे आज्ञाभंजक होते. (इब्ने कसीर)
११) अहंकाराचा अर्थ आहे, अल्लाहच्या निशाण्या आणि आदेशांच्या तुलनेत स्वत:ला मोठे समजणे आणि लोकांना क्षुल्लक लेखणे. हा अहंकार मनुष्याला शोभत नाही. कारण की अल्लाह निर्माता आहे आणि तो त्याची निर्मिती. निर्मित असून निर्मात्याचा सामना करणे, आणि त्याचे आदेश आणि मार्गदर्शनापासून तोंड फिरवणे आणि बेपर्वा होणे, कोण्या प्रकारेही योग्य नाही. म्हणून अहंकार (गर्व) अल्लाहला आवडत नाही. या महावाक्यांत अहंकाराचा परिणाम दाखवण्यांत आला आहे; की अल्लाहतआलाला त्यांना त्याच्या निशाण्यांपासून दूरच ठेवतो. मग ते एवढे दूर होऊन जातात की,कुठल्याही प्रकारची निशाणी त्यांना सत्याकडे आणण्यात यशस्वी होत नाही. जसे की, दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''ज्यांच्यावर तुझ्या पालनकर्त्याची गोष्ट सिद्ध होऊन राहिली, ते ईमान आणणार नाही. मग भलेही त्यांच्याजवळ, हर प्रकारची निशाणी येऊन जावो. येथपर्यंत की वेदनादायक शिक्षा पाहून घेतील.'' (सू.यूनुस ९६-९७)
१२) यात अल्लाहच्या आदेशाकडून तोंड फिरवणाऱ्यांची आणखी एक सवय किंवा खोडीचा उल्लेख आहे की, हिदायतची कोणी गोष्ट त्यांच्यासमोर आली, तर तिला मानत नाही; तथापि मार्गभ्रष्टतेची कोणी गोष्ट पाहतात,तर तिचा ताबडतोब स्वीकार करतात. आणि त्यावर अंमल करू लागतात. कुरआन करीमने वर्णन केलेल्या या वास्तवाचा, प्रत्येक काळांत अनुभव घेतला जाऊ शकतो. आज आम्ही सुद्धा, प्रत्येक ठिकाणी, आणि प्रत्येक समाजात येथ पावेतो की, मुसलमान समाजात सुद्धा, हेच काही पहात आहोत की, चांगुलपणा तोंड लपवून फिरत आहे, आणि वाईटाचा प्रत्येकजण लगबगीने अंगिकार करीत आहे.
१३) हे या गोष्टीचे कारण सांगितले जात आहे की, लोक पुण्याच्या तुलनेत पापाला आणि सत्याच्या तुलनेत असत्याला का जास्त स्वीकारतात? हे कारण आहे अल्लाहच्या निशाण्यांना नाकारणे आणि त्यांच्याकडून बेपर्वाही आणि तोंड फिरवणे, हे सर्व समाजात सर्रास आढळून येते.

وَالَّذِينَ كَذَّبُوا بِآيَاتِنَا وَلِقَاءِ الْآخِرَةِ حَبِطَتْ أَعْمَالُهُمْ ۚ هَلْ يُجْزَوْنَ إِلَّا مَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿١٤٧﴾

**आणि हे लोक ज्यांनी आमच्या निशाण्यांना आणि कयामतच्या येण्याला खोटे ठरविले, त्यांचे सर्व केले सवरले अक्रित झाले; त्यांना तीच शिक्षा दिली जाईल, जे काही हे करीत होते[१] ﴿١٤٧﴾**

وَاتَّخَذَ قَوْمُ مُوسَىٰ مِنْ بَعْدِهِ مِنْ حُلِيِّهِمْ عِجْلًا جَسَدًا لَهُ خُوَارٌ ۚ أَلَمْ يَرَوْا أَنَّهُ لَا يُكَلِّمُهُمْ وَلَا يَهْدِيهِمْ سَبِيلًا ۘ اتَّخَذُوهُ وَكَانُوا ظَالِمِينَ ﴿١٤٨﴾

**आणि मूसाच्या लोकांनी त्याच्यानंतर आपल्या दागिन्यांचे एक वासरू उपास्य बनवून घेतले; जे की, एक निर्जिव शरीर होते, ज्याच्यात एक आवाज होता. काय त्यांनी हे पाहिले नाही की, ते त्यांच्याशी बोलत नव्हते. तसेच त्यांना कोणी मार्गपण दाखवत नव्हते. त्याला त्यांनी उपास्य ठरविले. आणि मोठे अन्यायाचे जालिम होते.[२] ﴿١٤٨﴾**

وَلَمَّا سُقِطَ فِي أَيْدِيهِمْ وَرَأَوْا أَنَّهُمْ قَدْ ضَلُّوا قَالُوا لَئِنْ لَمْ يَرْحَمْنَا رَبُّنَا وَيَغْفِرْ لَنَا لَنَكُونَنَّ مِنَ الْخَاسِرِينَ ﴿١٤٩﴾

**आणि जेव्हा पश्चात्ताप पावले[३], आणि ठाऊक झाले की, खरोखर ते लोक मार्गभ्रष्टतेत पडून गेले, तेव्हा म्हणू लागले की, जर आमच्या पालनकर्त्याने आमच्यावर दया केली नाही; आणि आमच्या अपराधाला क्षमा करणार नाही, तर आम्ही तोट्यांत येऊन जाऊ ﴿١٤٩﴾**

وَلَمَّا رَجَعَ مُوسَىٰ إِلَىٰ قَوْمِهِ غَضْبَانَ أَسِفًا قَالَ بِئْسَمَا خَلَفْتُمُونِي مِنْ بَعْدِي ۖ أَعَجِلْتُمْ أَمْرَ رَبِّكُمْ ۖ وَأَلْقَى الْأَلْوَاحَ وَأَخَذَ بِرَأْسِ أَخِيهِ يَجُرُّهُ إِلَيْهِ ۚ قَالَ ابْنَ أُمَّ إِنَّ الْقَوْمَ اسْتَضْعَفُونِي وَكَادُوا يَقْتُلُونَنِي فَلَا تُشْمِتْ بِيَ الْأَعْدَاءَ وَلَا تَجْعَلْنِي مَعَ الْقَوْمِ الظَّالِمِينَ ﴿١٥٠﴾

**आणि जेव्हा मूसा आपल्या लोकांकडे परत आले, राग आणि दु:खात उद्वीग्न होऊन, तेव्हा म्हणाले की, तुम्ही माझ्यानंतर ही फारच वाईट गोष्ट केली. काय तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या हुकूमाआधीच, घाई करून बसला? आणि लवकर लवकर तक्ते, एका बाजूला ठेवले[४], आणि आपल्या भावाचे डोके धरून त्यांना आपल्याकडे ओढू लागले. हारून (अ.) ने म्हटले की, हे माझ्या सहोदर[५] (भावा!) या लोकांनी मला दुर्बल समजले, आणि शक्यता होती (त्यांनी) मला ठार मारून टाकले[६] असते, तर तू. दुष्मनांस माझेवर हसवू नकोस[७]. आणि मला या जालीम लोकांत शामील करू नकोस[८] ﴿١٥٠﴾**

قَالَ رَبِّ اغْفِرْ لِي وَلِأَخِي وَأَدْخِلْنَا فِي رَحْمَتِكَ ۖ وَأَنْتَ أَرْحَمُ الرَّاحِمِينَ ﴿١٥١﴾

**मूसा (अ.) ने म्हटले की हे माझ्या पालनकर्त्या! तू माझा आणि माझ्या भावाचा अपराध क्षमा कर; आणि आम्हा दोघांस आपल्या दयेत दाखल करून घे. आणि तू सर्व दया करणाऱ्यांत जास्त दया करणारा आहेस ﴿١٥١﴾**

إِنَّ الَّذِينَ اتَّخَذُوا الْعِجْلَ سَيَنَالُهُمْ غَضَبٌ مِنْ رَبِّهِمْ وَذِلَّةٌ فِي الْحَيَاةِ الدُّنْيَا ۚ وَكَذَٰلِكَ نَجْزِي الْمُفْتَرِينَ ﴿١٥٢﴾

**नि:संशय ज्या लोकांनी वासराची पुजा केली आहे, त्यांच्यावर फार लवकर त्यांच्या पालनकर्त्याकडून कोप आणि फजिती या ऐहिक जीवनातच येऊन पडेल[९]. आणि आम्ही खोटे कुभांड रचणाऱ्यांना अशीच शिक्षा देत असतो[१०] ﴿١٥٢﴾**

وَالَّذِينَ عَمِلُوا السَّيِّئَاتِ ثُمَّ تَابُوا مِنْ بَعْدِهَا وَآمَنُوا إِنَّ رَبَّكَ مِنْ بَعْدِهَا لَغَفُورٌ رَحِيمٌ ﴿١٥٣﴾

**आणि ज्या लोकांनी अपराधाची कामे केलीत, आणि त्यानंतर ते पश्चात्ताप व्यक्त करतील आणि ईमान आणतील, तर तुमचा पालनकर्ता या पश्चात्तापानंतर अपराधांना क्षमाकर्ता आणि दयाळू आहे[११] ﴿١٥٣﴾**

وَلَمَّا سَكَتَ عَنْ مُوسَى الْغَضَبُ أَخَذَ الْأَلْوَاحَ ۖ وَفِي نُسْخَتِهَا هُدًى وَرَحْمَةٌ لِلَّذِينَ هُمْ لِرَبِّهِمْ يَرْهَبُونَ ﴿١٥٤﴾

**आणि मग जेव्हा मूसा (अ.) चा राग शांत झाला, तर या तक्त्यांना उचलून घेतले; आणि त्यांच्या विषयामध्ये[१२] त्या लोकांसाठी, जे आपल्या पालनकर्त्याला भीत होते; मार्गदर्शन आणि दया होती[१३] ﴿١٥٤﴾**

१) याच्यात अल्लाहच्या निशाण्यांना खोटे म्हणणे आणि परलोकाला नाकारण्याचा परिणाम दाखविण्यात आला आहे, की, त्यांच्या कर्माचा पाया, न्याय आणि सत्त्यावर नाही, अन्याय आणि असत्त्यावर आहे. म्हणून त्यांच्या कर्मपत्रात वाईटच वाईट असेल. ज्याची काहीही किंमत अल्लाहतआलाजवळ असणार नाही. हां! या वाईटाचा बदला त्यांना जरूर तेथे दिला जाईल.

२) मूसा عليه السلام जेव्हा चाळीस रात्रींसाठी तूर पर्वतावर गेले, तर मागून सामरी नावांच्या मनुष्याने सोन्याचे दागिने एकत्र करून, एक वासरू तयार केले. ज्यात त्याने जिब्रईल عليه السلام च्या घोड्याच्या टापे खालची माती पण जी त्याने सांभाळून ठेवली होती, शामील करून दिली. ज्यांत अल्लाहने जीवनाचा परिणाम ठेवला होता. ज्यामुळे ते वासरू काही काही

बैलाचा आवाज काढत असे. (परंतु स्पष्ट बोलणे, आणि मार्गदर्शन करण्याला असमर्थ होते. जसे की, कुरआनाचे शब्द स्पष्ट करीत आहे.) यांत मतभेद आहे की, ते खरोखर हाडा मांसाचे वासरू बनून गेले की, ते होतेच सोन्याचे, परंतु त्यांत कुठल्यातरी पद्धतीने हवा जात होती तर त्यातून गाय बैलासारखा आवाज निघत असे. (इब्ने कसीर) या आवाजाने सामरीने बनी इस्त्राईलला बहकविले, की तुमचा उपास्य तर हा आहे. मूसा عليه السلام विसरून गेले आहेत; आणि ते उपास्याच्या शोधांत तूर पर्वतावर गेले आहेत. (ही घटना सू. ताहा मध्ये येईल.)

३) 'सुकिता फी अयदीहिम' वाक्प्रचार आहे, जिचा गर्भितार्थ, पश्चात्ताप पावणे आहे. हा पश्चात्ताप मूसा عليه السلام च्या परतीनंतर झाला. जेव्हा त्यांनी येऊन यावर त्यांची कानउघाडणी केली. जसे की, सू.ताहामध्ये आहे. येथे त्याला प्राधान्य यासाठी दिले गेले की त्यांची कृती आणि उक्ती एकत्र होऊन जावी. (फत्हुल कदीर).

४) जेव्हा मूसा عليه السلام नी येऊन पाहिले की, ते वासराच्या उपासनेत लागलेले आहेत, तर फारच क्रोधीत झाले, आणि घाईघाईत तक्तेपण जे तूर पर्वतावरून आणले होते; अशा प्रकारे ठेवले की, पाहणाऱ्याला वाटावे की, त्यांनी खाली फेकून दिले आहेत. ज्याला कुरआनाने ''टाकून दिले'' ने सूचित केले आहे. तथापि जर फेकून पण दिले असतील, तर यांत बेअदबी नाही, कारण उद्देश या तक्त्यांची बेअदबी नव्हता. परंतु धार्मिक लाजेत बेभान होऊन, नकळत त्यांच्याकडून हे काम घडले.

५) ह. हारून عليه السلام आणि ह.मूसा عليه السلام आपसांत सख्खे भाऊ होते. येथे ह.हारून عليه السلام नी 'माँ जाई'' यासाठी म्हटले की, या शब्दांत प्रेम आणि नम्रता यांच्याकडे जास्त दिसून येते आहे.

६) ह.हारून عليه السلام नी ही आपली सबब पुढे केली की, जिच्यामुळे लोकांना 'शिर्क' सारख्या मोठ्या अपराधापासून रोकण्याला ते अयशस्वी राहिले. एक आपली दुर्बलता, दुसरा बनी इस्त्राईलचा अहंकार आणि शिरजोरी, की त्यांना ठार मारून टाकण्यापर्यंत तयार होऊन गेले होते. आणि त्यांना आपला जीव वाचवण्याकरीता गुपचुप बसावे लागले, ज्याची परवानगी अशावेळी अल्लाहने दिलेली आहे.

७) मलाच बुरे भले म्हटल्याने शत्रू खूष होतील, जेव्हा की हा प्रसंग तर शत्रुला ठेचून काढण्याचा आणि त्यांच्यापासून आपल्या लोकांना वाचवण्याचा आहे.

८) आणि तसे सुद्धाश्रद्धा आणि कर्मात मला, या लोकांबरोबर कसे बरे शामील केले जाऊ शकते ? मी न शिर्कचा मार्ग अनुसरला; न त्याची परवानगी दिली न त्याच्यावर प्रसन्न झालो. फक्त खामोश राहिलो. आणि यासाठी सुद्धा माझ्याजवळ पुरेशी सबब उपस्थित आहे. मग माझी गणती जालीमांबरोबर (शिर्क करणाऱ्यांबरोबर) कशा प्रकारे होऊ शकते? म्हणून ह.मूसा عليه السلام नी आपल्यासाठी, आणि आपला भाऊ ह.हारून عليه السلام साठी क्षमा आणि दयेची प्रार्थना केली.

९) अल्लाहचा कोप हा होता की, पश्चात्ताप व्यक्त करण्यासाठी ठार मारणे आवश्यक ठरले आणि याच्यापूर्वी जो पर्यंत जिवंत राहिले फजिती आणि मानहानीस ते पात्र ठरले.

१०) आणि ही शिक्षा त्यांच्याचसाठी खास नाही; जो पण अल्लाहवर खोटे कुभांड रचतो, त्याला आम्ही हीच शिक्षा देतो.

११) हां! ज्यांनी तौबा केली, त्यांच्यासाठी अल्लाहतआला क्षमाकर्ता व दयाळू आहे. याने ठाऊक झाले की, तौबाने प्रत्येक अपराध माफ होऊन जातो. या अटीवर की खऱ्या मनाने तौबा केली जावी.

१२) 'नुसखतुन' 'फुअलतुन' च्या वजनावर 'मफअुल' च्या अर्थात आहे. हे त्या मूळला (ओरिजनल) पण म्हणतात, ज्यावरून नक्कल (कॉपी) केली जावी. आणि नक्कल झालेला पण 'नुसखा' म्हणण्यात येते. येथे 'नुसखा' ने अभिप्रेत, एक तर त्या मूळ दगडाच्या पाट्या आहेत; ज्यावर तौरात लिहले गेले होते; किंवा याच्याने अभिप्रेत ते दुसरे लिहिलेले (नुसखा) आहे; जे पाट्या जोरांत फेकून दिल्यामुळे तुटून गेल्यानंतर त्यांच्यावरून नक्कल करून केल्या गेल्या होत्या. तथापि बरोबर गोष्ट पहिलीच वाटते. कारण की, पुढे वर्णन आले आहे की, ह. मूसा عليه السلام नी त्या पाट्यांना उचलून घेतले. याने ठाऊक होते की, पाट्या तुटल्या नव्हत्या.

१३) तौरातला पण कुरआन करीम प्रमाणे त्याच लोकांसाठी मार्गदर्शन आणि दया ठरविण्यांत आले आहे, जे अल्लाहला भिणारे आहेत. कारण की खरा फायदा अशा आकाशी ग्रंथापासून अशाच लोकांना होतो. दुसऱ्या लोकांनी कारण की, आपल्या कानांनी सत्य ऐकण्याला, डोळ्यांनी सत्य पाहण्याला, बंद केलेले असते. म्हणून या फायदा देणाऱ्या निर्झरापासून ते सर्व साधारण वंचितच् असतात.

وَاخْتَارَ مُوْسٰى قَوْمَهٗ سَبْعِيْنَ رَجُلًا لِّمِيْقَاتِنَا ۚ فَلَمَّآ اَخَذَتْهُمُ الرَّجْفَةُ قَالَ رَبِّ لَوْ شِئْتَ اَهْلَكْتَهُمْ مِّنْ قَبْلُ وَاِيَّايَ ۭ اَتُهْلِكُنَا بِمَا فَعَلَ السُّفَهَاۗءُ مِنَّا ۚ اِنْ هِيَ اِلَّا فِتْنَتُكَ ۭ تُضِلُّ بِهَا مَنْ تَشَاۗءُ وَتَهْدِيْ مَنْ تَشَاۗءُ ۭ اَنْتَ وَلِيُّنَا فَاغْفِرْ لَنَا وَارْحَمْنَا وَاَنْتَ خَيْرُ الْغٰفِرِيْنَ ﴿١٥٥﴾

**आणि मूसा (अ.) ने आपल्या लोकांतून सत्तर माणसे, आमच्या निश्चित वेळेसाठी निवडून घेतली. मग जेव्हा त्यांना भूकंपाने येऊन पकडले[१]; तेव्हा मूसा (अ.) विनंती करू लागले की, हे माझ्या पालनकर्त्या! जर तुला मंजुर असते; तर याच्यापूर्वीच, यांना आणि मला नष्ट करून टाकले असते. कोठे तू आम्हांस, काही मूर्ख लोकांच्या कृत्यावर सर्वांना नष्ट करून टाकणार? ही घटना निव्वळ तुझ्याकडून एक परीक्षा आहे. अशा परीक्षांमुळे तू ज्याला इच्छिल त्याला मार्गभ्रष्ट करून टाकशील; आणि ज्याला इच्छिल त्याला सरळ मार्गावर कायम ठेवशील, तूच तर आमचा हितचिंतक आहेस, बस आमच्यावर क्षमा आणि दया कर. आणि तू सर्व माफ करणाऱ्यात उत्तम (माफ करणारा) आहेस[२] ﴿१५५﴾**

وَاكْتُبْ لَنَا فِيْ هٰذِهِ الدُّنْيَا حَسَنَةً وَّفِي الْاٰخِرَةِ اِنَّا هُدْنَآ اِلَيْكَ ۭ قَالَ عَذَابِيْٓ اُصِيْبُ بِهٖ مَنْ اَشَاۗءُ ۚ وَرَحْمَتِيْ وَسِعَتْ كُلَّ شَيْءٍ ۭ فَسَاَكْتُبُهَا لِلَّذِيْنَ يَتَّقُوْنَ وَيُؤْتُوْنَ الزَّكٰوةَ وَالَّذِيْنَ هُمْ بِاٰيٰتِنَا يُؤْمِنُوْنَ ﴿١٥٦﴾ۚ

**आणि आमच्या नावे इहलोकांत आणि परलोकांत कल्याण लिहून दे. आम्ही तुझ्याच मार्गांत लागलो आहोत[३]. अल्लाहतआलाने म्हटले, मी माझी शिक्षा त्याच लोकांना देतो ज्यांना ती इच्छितो आणि माझी दया सर्व वस्तुमात्रास घेरून आहे[४]. तर ती दया त्या लोकांचे नावे जरूर लिहीन, जे अल्लाहतआलाला भितात; आणि जकात देतात; आणि जे आमच्या निशाण्यांवर ईमान आणतात ﴿१५६﴾**

१) या सत्तर माणसांचा तपशील पुढच्या समासांत येत आहे. येथे हे दाखविण्यात आले आहे की, ह.मूसा عليه السلام नी आपल्या लोकांतून सत्तर माणसे निवडली, आणि त्यांना तूर पर्वतावर घेऊन गेले. तेथे त्यांना शिक्षा म्हणून नष्ट करून टाकण्यात आले, ज्यावर ह.मूसा عليه السلام नी म्हटले,

२) बनी इस्त्राईलची ही सत्तर माणसे कोण होती? यात भाष्यकारांचा मतभेद आहे. एक मत हे आहे की, जेव्हा ह. मूसा عليه السلام नी त्यांना तौरातचे आदेश ऐकविले, तेव्हा त्यांनी म्हटले की, आम्ही कसा विश्वास करावा की हे पुस्तक खरोखर अल्लाहतआलाकडूनच अवतरीत झाले आहे? आम्ही तर जोपर्यंत स्वत: अल्लाहतआलाला संभाषण करताना न ऐकूण घेऊ, त्याला मान्य करणार नाही. म्हणून त्यांनी सत्तर निवडक लोकांची निवड करून घेतली; आणि त्यांना तूर पर्वतावर घेऊन गेले. तेथे अल्लाहतआलाने ह. मूसा عليه السلام शी संभाषण केले; ज्याला या लोकांनी पण ऐकले. परंतु तेथे त्यांनी नवीन एक मागणी पुढे केली; की आम्ही जोपर्यंत अल्लाहला, आपल्या डोळ्यांनी पाहून घेणार नाही, ईमान आणणार नाही. दुसरे मत हे आहे की, ही सत्तर माणसे ती आहेत, ज्यांना सर्व लोकांकडून वासरांच्या भक्तीच्या मोठ्या अपराधाची तौबा आणि माफी करता, तूर पर्वतावर नेण्यात आले होते. आणि तेथे जाऊन त्यांनी अल्लाहला पाहण्याची इच्छा व्यक्त केली. तिसरे मत हे आहे की, ही सत्तर माणसे ती आहेत, की ज्यांनी बनी इस्त्राईलला वासराची उपासना करताना पाहिले, परंतु त्यांना यापासून मना केले नाही. एक चौथे मत हे आहे की, ही सत्तर माणसे ती आहेत ज्यांना अल्लाहच्या हुकूमाने तूर पर्वतावरून घेऊन जाण्यास, निवडून घेण्यात आले होते. तेथे जाऊन त्यांनी अल्लाहजवळ दुआ (प्रार्थना) केल्यांत. त्यातून एक दुआ ही पण होती की, ''हे अल्लाह ! आम्हांस तू ते दे, जे याच्यापूर्वी तू कोणास दिले नाही. तसेच पुढे सुद्धा तू कोणास देऊ नये.'' अल्लाहतआलाला ही दुआ आवडली नाही; ज्यावर ते धरणीकंपाने नष्ट करून टाकले गेले. अधिकतर भाष्यकार दुसऱ्या मताशी सहमत आहेत. आणि त्याला त्यांनी तीच घटना ठरविली आहे, जिचा उल्लेख सू बकर: आ. ५६ मध्ये आला आहे. जेथे त्यांच्यावर कडकणारी आणि जमिनीवर पडणाऱ्या विजेने मृत्यू पावण्याचा उल्लेख आहे. आणि येथे धरणीकंपाने मृत्यूचा उल्लेख आहे. याच्या खुलाशांत सांगण्यांत आले आहे की, शक्य आहे दोन्हीही अजाब (शिक्षा) आल्या असाव्यांत. वरून विजेची कडक आणि खालून धरणीकंप. तथापि ह. मूसा عليه السلام च्या दुआ आणि विनवणीनंतर, की जर यांना नष्टच करावयाचे होते; याच्यापूर्वी त्यावेळी नष्ट करता, ज्यावेळी हे वासराच्या भक्तीत गर्क होते. अल्लाहतआलाने त्यांना जिवंत करून टाकले.

३) म्हणजे तौबा करीत आहोत.

४) ही त्याच्या दयेची विशालताच आहे की जगांत पुण्यवान आणि आज्ञाभंजक, ईमानवाले आणि काफिर दोन्ही सुद्धा त्यांच्या दयेने फायदा उचलत आहेत. हदीसमध्ये येते, ''अल्लाहच्या दयेचे १०० भाग आहेत. हा त्याच्या दयेचा एक भाग आहे की, ज्याच्याने सृष्टी, एक दुसऱ्यावर दया करते. आणि जंगली जनावरे, आपल्या पिलांवर वात्सल्य करतात; आणि त्याने आपल्या दयेचे ९९ भाग आपल्याजवळ ठेवले आहेत.'' (स.मुस्लीम क्र.२१०८ आणि इब्ने माजा क्र.४२९३)

اَلَّذِيْنَ يَتَّبِعُوْنَ الرَّسُوْلَ النَّبِيَّ الْاُمِّيَّ الَّذِيْ
يَجِدُوْنَهٗ مَكْتُوْبًا عِنْدَهُمْ فِي التَّوْرٰىةِ وَالْاِنْجِيْلِ ز
يَاْمُرُهُمْ بِالْمَعْرُوْفِ وَيَنْهٰهُمْ عَنِ الْمُنْكَرِ وَيُحِلُّ
لَهُمُ الطَّيِّبٰتِ وَ يُحَرِّمُ عَلَيْهِمُ الْخَبٰٓئِثَ وَ يَضَعُ عَنْهُمْ
اِصْرَهُمْ وَالْاَغْلٰلَ الَّتِيْ كَانَتْ عَلَيْهِمْ ط فَالَّذِيْنَ اٰمَنُوْا
بِهٖ وَ عَزَّرُوْهُ وَ نَصَرُوْهُ وَاتَّبَعُوا النُّوْرَ الَّذِيْٓ
اُنْزِلَ مَعَهٗٓ لا اُولٰٓئِكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ (١٥٧) ع ١٩ ٦ ٩

जे लोक असा पैगंबर, जो निरक्षर आहे, त्याचे अनुकरण करतात; ज्यांना ते लोक, आपल्या तौरात आणि इंजील मध्ये लिहिलेले पावतात[१]. तो त्यांना चांगली कामे करण्याचा हुकूम देतो आणि वाईट गोष्टींपासून मना करतो[२]; आणि शुद्ध चोख्या वस्तूंना हलाल सांगतो; आणि अशुद्ध वस्तूंना त्यांच्यासाठी निषिद्ध (हराम) करतो. आणि या लोकांवर जी ओझे आणि जोखडे होती[३]; त्यांना दूर करतो. तर जे लोक या पैगंबरावर ईमान आणतात, आणि त्याला पाठींबा देतात; आणि त्याची मदत करतात, आणि त्या प्रकाशा (कुरआन) चे अनुकरण करतात जो त्यांचे बरोबर पाठविला गेला आहे;असेच लोक पूर्ण साफल्य मिळवणारे आहेत[४] (१५७)

قُلْ يٰٓاَيُّهَا النَّاسُ اِنِّيْ رَسُوْلُ اللّٰهِ اِلَيْكُمْ جَمِيْعَاْ
الَّذِيْ لَهٗ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ج لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ
يُحْيٖ وَ يُمِيْتُ ص فَاٰمِنُوْا بِاللّٰهِ وَ رَسُوْلِهِ النَّبِيِّ
الْاُمِّيِّ الَّذِيْ يُؤْمِنُ بِاللّٰهِ وَكَلِمٰتِهٖ وَاتَّبِعُوْهُ لَعَلَّكُمْ
تَهْتَدُوْنَ (١٥٨)

आपण सांगून टाका की, अहो लोकांनो! मी तुम्हा सर्वांकडे, त्या अल्लाहकडून पाठविलेला आहे, ज्याचे राज्य सर्व आकाशांत आणि पृथ्वीत आहे. त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही; तोच जिववितो आणि तोच मारतो; म्हणून (तुम्ही) अल्लाहतआलावर ईमान आणा आणि त्याच्या निरक्षर पैगंबरावर जे की अल्लाहतआलावर आणि त्याच्या आदेशांवर ईमान ठेवतात. आणि त्यांचे अनुपालन करा; की तुम्ही सरळमार्गावर येऊन लागावे[५] (१५८)

وَمِنْ قَوْمِ مُوْسٰٓى اُمَّةٌ يَّهْدُوْنَ بِالْحَقِّ وَبِهٖ
يَعْدِلُوْنَ (١٥٩)

आणि मूसाच्या लोकांत, काही लोक असेही आहेत की, जे सत्त्याप्रमाणे मार्ग दाखवतात आणि त्याच्याप्रमाणेच न्यायपण करतात[६] (१५९)

وَقَطَّعْنٰهُمُ اثْنَتَيْ عَشْرَةَ اَسْبَاطًا اُمَمًا ط وَاَوْحَيْنَآ
اِلٰى مُوْسٰٓى اِذِ اسْتَسْقٰهُ قَوْمُهٗٓ اَنِ اضْرِبْ بِّعَصَاكَ
الْحَجَرَ ج فَانْبَجَسَتْ مِنْهُ اثْنَتَا عَشْرَةَ عَيْنًا ط
قَدْ عَلِمَ كُلُّ اُنَاسٍ مَّشْرَبَهُمْ ط وَظَلَّلْنَا عَلَيْهِمُ
الْغَمَامَ وَاَنْزَلْنَا عَلَيْهِمُ الْمَنَّ وَالسَّلْوٰى ط كُلُوْا مِنْ
طَيِّبٰتِ مَا رَزَقْنٰكُمْ ط وَمَا ظَلَمُوْنَا وَلٰكِنْ كَانُوْٓا
اَنْفُسَهُمْ يَظْلِمُوْنَ (١٦٠)

आणि आम्ही त्यांना बारा घराण्यात विभागून त्याचे वेगवेगळे गट निश्चित केले[७]. आणि आम्ही मूसाला हुकूम दिला, जेव्हा की त्याच्या लोकांनी त्याचेजवळ पाणी मागितले; की आपली काठी अमुक दगडावर मार. तेव्हा ताबडतोब त्याच्यातून बारा झरे फुटून निघाले. प्रत्येक गटाने आपआपला पाणवठा माहित करून घेतला. आणि आम्ही त्यांच्यावर आभाळाची सावली केली. आणि त्यांच्यावर 'मन्न' व 'सलवा' उतारली. खा, उमद्या वस्तूंतून, जी आम्ही तुम्हास दिली आहे; आणि त्यांनी आमचे काही नुकसान केले नाही; परंतु आपलेच नुकसान करीत होते (१६०)

وَاِذْ قِيْلَ لَهُمُ اسْكُنُوْا هٰذِهِ الْقَرْيَةَ وَكُلُوْا مِنْهَا حَيْثُ
شِئْتُمْ وَقُوْلُوْا حِطَّةٌ وَّادْخُلُوا الْبَابَ سُجَّدًا نَّغْفِرْ لَكُمْ
خَطِيْٓـٰٔتِكُمْ ط سَنَزِيْدُ الْمُحْسِنِيْنَ (١٦١)

आणि जेव्हा त्यांना हुकूम देण्यात आला की, तुम्ही लोक या वस्तीत जाऊन रहा; आणि खा, ज्या ठिकाणाहून तुम्हास आवडेल; आणि तोंडाने हे म्हणत जा की, (आम्ही) तौबा करतो. आणि खाली वाकून दरवाज्यातून प्रवेश करावा; तर आम्ही तुमचे अपराध क्षमा करून टाकू. जे लोक चांगल्याप्रकारे (हे) काम करतील, (आम्ही) त्यांना आणखी जास्तपण देऊ (१६१)

१) हे महावाक्य सुद्धा या हुकूमाच्या स्पष्टीकरणासाठी संपूर्ण 'नस्स'चा दर्जा ठेवते. की, मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणल्याशिवाय, परलोकातील मुक्ती शक्य नाही; आणि ईमान तेच भरोशाच्या लायक आहे; ज्याचा तपशिल मुहम्मद रसूलुल्लाह ﷺ नी वर्णन केलेला आहे. या महावाक्यावरून सुद्धा, सर्वधर्मसमभावाच्या कल्पनेचे मुळापासून निर्मुलन होते.

२) 'मअरूफ' ते आहे ज्याला धर्मशास्त्राने चांगले, आणि 'मुनकर' ते आहे ज्याला धर्मशास्त्राने वाईट ठरवले आहे.

३) हे ओझे आणि जोखड ते आहे, जे मागच्या धर्मशास्त्रांत होते. उदाहरणार्थ जिवाच्या बदल्यांत जिवाला ठार करणे जरूरी होते. (प्राणमूल्य किंवा क्षमा करणे नव्हते) किंवा ज्या कपड्याला घाण लागून जात असे, त्याला फाडून टाकणे

आवश्यक होते. इस्लामी धर्मशास्त्राने याला फक्त धुण्याचा हुकूम दिला. ज्याप्रमाणे किसासमध्ये प्राणमूल्य आणि क्षमेचीपण परवानगी दिली वगैरे. आणि आपण ﷺ नी पण फर्माविले, ''मला सोप्या खऱ्या धर्मासह पाठविले गेले आहे.'' (मुसनद अहमद) परंतु खेदाने म्हणावे लागते की, या उम्मतने आपल्याकडून रितीरिवाजांचे बरेचसे ओझे, आपल्यावर लादून घेतले आहे. आणि अडाणीपणाची जोखडे आपल्या गळ्यांत घालून घेतली आहेत. ज्याच्याने लग्न आणि मृत्यू दोन्ही एक प्रकारच्या शिक्षा होऊन गेल्या आहेत. अल्लाहतआला आम्हाला हिदायत देवो ! (आमीन)

४) या शेवटच्या शब्दांनी पण हीच गोष्ट स्पष्ट होते की, यशस्वी तेच लोक होतील जे हजरत मुहम्मद ﷺ वर ईमान आणणारे आणि त्यांचे अनुकरण करणारे असतील. जे मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणणार नाही; ते यशस्वी नाही; नुकसान उचलणारे आणि अयशस्वी होतील. याच्याशिवाय की, सफलतेने अभिप्रेत परलोकांतील सफलता आहे. हे शक्य आहे की, कोणी लोक ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान ठेवत नसेल; आणि त्यांना ऐहिक सुसंपन्नता आणि सुबत्तता प्राप्त असेल; ज्याप्रमाणे सध्या पश्चिमी आणि युरोपीय, आणि दुसऱ्या काही लोकांची स्थिती आहे. की ते ख्रिस्ती किंवा यहूदी किंवा नास्तिक व बहुदेववादी असून सुद्धा भौतिक प्रगती आणि सुसंपन्नतेत अग्रेसर आहेत. परंतु यांची ही प्रगती तात्कालीक आणि कसोटी म्हणून आहे. ही त्यांच्या परलोकातील साफल्याची हमी किंवा निशाणी नाही. याचप्रमाणे वत्तबऊल् नुरल्लजी उनजिला मअहूं ने ही गोष्ट स्पष्ट होते की, सू. माइदःच्या आ. १७ मध्ये 'नूर' ने अभिप्रेत कुरआन मजीदच आहे. (जसे की तेथे पण स्पष्टीकरण केले गेले होते.) कारण जो 'नूर' आपल्या बरोबर अवतरीत केला गेला आहे. तो कुरआन मजीदच आहे. म्हणून या 'नूर' ने स्वत: नबी करीम ﷺ चे व्यक्तीत्व अभिप्रेत नाही. हां! ही वेगळी गोष्ट आहे की, आपल्या विशेषणांत एक विशेषण 'नूर' पण आहे. ज्याच्याने कुफ्र आणि शिर्क चा अंधकार दूर झाला परंतु आपले 'नूरी' वैशिष्ट्य असण्याने आपले 'नुरून, मिन नुरील्लाह्' होणे सिद्ध होऊ शकत नाही. (म्हणजे हजरत मुहम्मद ﷺ अल्लाहच्या नूरमधून एक नूर आहे, असे नाही.) ज्याप्रमाणे बिदअतवाले हे सिद्ध करतात. बिदअतवाल्यांची ही श्रद्धा ख्रिस्त्यांच्या मसीहचे अल्लाहचा पुत्र होण्याच्या श्रद्धेशी मिळतीजुळती आणि त्याचप्रमाणे निरर्थक आहे. 'नाऊजु बिल्लाह् मिनहुमा'

५) हे महावाक्य सुद्धा ह. मुहम्मद ﷺ ची पैगंबरी ही ते सर्व जगासाठी पैगंबर आहेत; यासाठी बिलकुल स्पष्ट पुरावा आहे. यात अल्लाहतआलाने नबी करीम ﷺ ला हुकूम दिला की, आपण सांगून टाका की, हे विश्वातील माणसांनो ! मी तुम्हा सर्वांकडे पैगंबर बनवून पाठविण्यात आलो आहे. अशा प्रकारे आपण ﷺ संपूर्ण मानव जातीसाठी पैगंबर आणि मुक्तीदाता आहेत. आता मुक्ती आणि मार्गदर्शन न खिस्तीत्वात आहे न यहूदीत्वात न कोण्या धर्मात. मुक्ती आणि मार्गदर्शन जर आहे तर फक्त इस्लामला स्वीकारण्याला, आणि त्यालाच अंगिकारण्यात आहे. या महावाक्यांत आणि याच्या आधीच्या महावाक्यांत सुद्धाआपणास ﷺ निरक्षर पैगंबर म्हणण्यात आले आहे. हे आपले एक खास वैशिष्ट्य आहे. 'उम्मी' चा अर्थ आहे न शिकलेला. म्हणजे कोणाजवळून कोणत्याही प्रकारचे शिक्षण घेतले नाही. परंतु असे असून सुद्धाआपण ﷺ नी जे कुरआन करीम सादर केले त्याच्या साहित्य विषयक महत्तेच्यापुढे साऱ्या जगांतील उत्कृष्ट साहित्यीकपण नामोहरण झाले आणि आपण जी शिकवण सादर केली, त्याची सत्त्यता आणि खरेपणाला मानणारे एक जग आहे. जे या गोष्टीचा पुरावा आहे की, आपण खरोखर अल्लाहचे सत्य सत्य पैगंबर आहेत. नाही तर एक 'न शिकलेला', न असे कुरआन सादर करूशकतो, न अशी शिकवण देऊ शकतो; जो न्यायाचा उत्कृष्ट नमुना, आणि मनुष्य मात्राच्या साफल्य आणि यशस्वीतेसाठी अत्यंत आवश्यक आहे. त्यांना अंगिकारल्याशिवाय, हे जग खऱ्या शांतीला आणि आनंद व संरक्षणाला पारखे होईल.

६) याच्याने अभिप्रेत तेच थोडेसे लोक आहेत, जे मुसलमान होऊन गेले होते. अब्दुल्लाह बिन सलाम वगैरे, रजी अल्लाहु अन्हुम.

७) 'असबात' 'सिब्त' चे अनेकवचन आहे. म्हणजे नातु (मुलाकडून) येथे अस्बात 'घराण्या' च्या अर्थात आहे. म्हणजे ह.याकूब عليه السلام च्या बारा पुत्रांपासून बारा घराणी अस्तित्वांत आली. प्रत्येक घराण्यावर अल्लाहतआलाने एक एक देखरेख करणारा पण निश्चित करून दिला होता. ''आणि त्याच्यातूनच बारा सरदार आम्ही निश्चित करून दिले.'' (सू. माइदः - १२) या ठिकाणी अल्लाहतआलाने, त्या बारा घराण्यांच्या काही काही वैशिष्टांमध्ये एक दुसऱ्यापेक्षा वरचढ होण्याच्या आधारावर, त्यांचे निरनिराळे गट होण्याला, एक उपकार म्हणून उल्लेख करीत आहे.

فَبَدَّلَ الَّذِيْنَ ظَلَمُوْا مِنْهُمْ قَوْلًا غَيْرَ الَّذِيْ قِيْلَ
لَهُمْ فَاَرْسَلْنَا عَلَيْهِمْ رِجْزًا مِّنَ السَّمَآءِ بِمَا كَانُوْا
يَظْلِمُوْنَ ﴿١٦٢﴾

तर त्या खोडकर लोकांनी, जे बोल त्यांना सांगण्यात आले होते, त्याला दुसऱ्याच बोलाने बदलून टाकले; यावरून आम्ही त्यांच्यावर आकाशांतून शिक्षा सादर केली; या कारणाने की, ते आज्ञाभंग करीत होते[१] (१६२)

وَسْـَٔلْهُمْ عَنِ الْقَرْيَةِ الَّتِيْ كَانَتْ حَاضِرَةَ الْبَحْرِ ۘ
اِذْ يَعْدُوْنَ فِي السَّبْتِ اِذْ تَاْتِيْهِمْ حِيْتَانُهُمْ يَوْمَ
سَبْتِهِمْ شُرَّعًا وَّيَوْمَ لَا يَسْبِتُوْنَ ۙ لَا تَاْتِيْهِمْ ۚ
كَذٰلِكَ ۚ نَبْلُوْهُمْ بِمَا كَانُوْا يَفْسُقُوْنَ ﴿١٦٣﴾

आणि आपण या लोकांना[२] त्या वस्तीवाल्यांचा[३] जे समुद्राच्या काठांजवळ वसले होते, त्यावेळेचा अहवाल विचारा, जेव्हा की ते शनिवारच्या बाबतीत, मर्यादेचे उल्लंघन करीत होते; जेव्हा की त्यांच्या शनिवारच्या दिवशी त्यांचे मासे प्रकट होऊन होऊन त्यांच्या समोर येत होते; आणि जेव्हा शनिवार नसे, तर यांचे समोर येत नसत. आम्ही अशा प्रकारे कसोटी घेत होतो या कारणाने की ते आज्ञाभंग करीत होते[४] (१६३)

وَاِذْ قَالَتْ اُمَّةٌ مِّنْهُمْ لِمَ تَعِظُوْنَ قَوْمًا ۙ اللّٰهُ
مُهْلِكُهُمْ اَوْ مُعَذِّبُهُمْ عَذَابًا شَدِيْدًا ۭ قَالُوْا
مَعْذِرَةً اِلٰى رَبِّكُمْ وَلَعَلَّهُمْ يَتَّقُوْنَ ﴿١٦٤﴾

आणि जेव्हा त्यांच्यातून एका गटाने असे म्हटले की, तुम्ही अशा लोकांना का उपदेश करता, ज्यांना अल्लाह् बिलकुल नष्ट करणार आहे. किंवा त्यांना कडक शिक्षा देणार आहे[५]. त्यांनी उत्तर दिले की, तुमच्या पालनकर्त्या समक्ष, दोषमुक्त करून घेण्यासाठी आणि अशासाठी की, कदाचित हे भीऊन जातील (१६४)

فَلَمَّا نَسُوْا مَا ذُكِّرُوْا بِهٖٓ اَنْجَيْنَا الَّذِيْنَ يَنْهَوْنَ عَنِ
السُّوْٓءِ وَاَخَذْنَا الَّذِيْنَ ظَلَمُوْا بِعَذَابٍۢ بَـِٔيْسٍۢ
بِمَا كَانُوْا يَفْسُقُوْنَ ﴿١٦٥﴾

तर जेव्हा जो उपदेश यांना समजावला[६] जात होता त्याला विसरूनच गेले; तेव्हा मग आम्ही त्या लोकांना वाचवून घेतले, जे या वाईट सवयीपासून मना करत होते; आणि त्या लोकांना जे अत्याचार करीत होते, एका कडक शिक्षेत पकडले; या कारणाने की ते आज्ञाभंग करीत होते[७] (१६५)

فَلَمَّا عَتَوْا عَنْ مَّا نُهُوْا عَنْهُ قُلْنَا لَهُمْ كُوْنُوْا
قِرَدَةً خٰسِـِٕيْنَ ﴿١٦٦﴾

म्हणजे जेव्हा ते, ज्या कामापासून त्यांना मना करण्यांत आले होते; त्याच्यात मर्यादेच्या बाहेर निघून गेले; तर आम्ही त्यांना म्हटले की, तुम्ही धुत्कारलेली माकडे बनून जा[८] (१६६)

وَاِذْ تَاَذَّنَ رَبُّكَ لَيَبْعَثَنَّ عَلَيْهِمْ اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ
مَنْ يَّسُوْمُهُمْ سُوْۗءَ الْعَذَابِ ۭ اِنَّ رَبَّكَ لَسَرِيْعُ
الْعِقَابِ ښ وَاِنَّهٗ لَغَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿١٦٧﴾

आणि (तो वेळपण आठवण करावयास पाहिजे) जेव्हा की, तुमच्या पालनकर्त्याने ही गोष्ट सांगितली की, तो या यहूद्यांवर कयामत पर्यंत अशा लोकांस नेमीत राहील, जे त्यांस कडक शिक्षांचा त्रास पोहचवीत राहतील[९]. यांत काहीच संशय नाही की तुमचा पालनकर्ता जलद शिक्षा करणारा आहे; आणि यांत काहीच शंका नाही तो खरोखर मोठा क्षमाकर्ता आणि मोठा दयाळू आहे[१०] (१६७)

وَقَطَّعْنٰهُمْ فِي الْاَرْضِ اُمَمًا ۚ مِنْهُمُ الصّٰلِحُوْنَ
وَمِنْهُمْ دُوْنَ ذٰلِكَ ۡ وَبَلَوْنٰهُمْ بِالْحَسَنٰتِ وَالسَّيِّاٰتِ
لَعَلَّهُمْ يَرْجِعُوْنَ ﴿١٦٨﴾

आणि आम्ही जगात त्यांचे वेगवेगळे समूह करून टाकले. काही त्यांच्यात सदाचरणी होते; आणि काही वेगळ्या प्रकारचे होते; आणि आम्ही त्यांना सुख आणि दु:ख या (दोन्ही तऱ्हेने) आजमावत राहिलो की कादचित ते (आमच्याकडे) वळतील[११] (१६८)

१) १६० ते १६२ महावाक्यात ज्या गोष्टी वर्णन केल्या गेल्या आहेत, ह्या त्या आहेत ज्या खंड (भाग) अलीफ लाम मीम, सू. बकर: च्या सुरवातीला वर्णन करण्यात आल्या आहेत. तेथे त्यांचा तपशील कृपया पाहून घेतला जावा.

२) 'वस्अल्हुम' मध्ये 'हुम्' ने अभिप्रेत यहूदी आहेत, म्हणजे त्यांना विचारा. याच्यात यहूद्यांना हे दाखविण्याचा उद्देश पण आहे की, या घटनेचे ज्ञान, नबी करीम ﷺ ला सुद्धा आहे; जो आपल्या सत्यतेचा पुरावा आहे. कारण की, अल्लाहकडून 'वह्य' शिवाय आपण ﷺ ला घटनेचे ज्ञान होऊ शकले नसते.

३) या वस्तीच्या संदर्भात मतभेद आहेत, कोणी तिचे नाव 'इला', कोणी 'तिब्रिया', कोणी 'इलिया' आणि कोणी सीरियाची कोणी वस्ती, जी समुद्राच्या जवळ होती, दाखवतात. भाष्यकारांचा जास्त कल 'इला' कडे आहे; जो मदयन आणि तूर पर्वताच्या दरम्यान, कुलजुम समुद्राच्या किनाऱ्यावर होती.

४) 'हितान' 'हूत ' (मासा) चे अनेकवचन आहे. 'शुर्रअन्' 'शारेअ'चे अनेकवचन आहे. अर्थ आहे पाण्याच्या वर

उसळून उसळून येणारे, हा यहूद्यांच्या या घटनेकडे इशारा आहे, ज्यात त्यांना शनिवारच्या दिवशी, माशांची शिकार करण्यापासून मना करण्यात आले होते. परंतु एक कसोटी म्हणून, शनिवारच्या दिवशी मासे भरपूर येत. आणि पाण्याच्या वर उसळून उसळून त्यांना शिकारीचे आमंत्रण देत. आणि जेव्हा हा दिवस निघून जाई, तर अशाप्रकारे येत नसत. सरशेवटी यहूद्यांनी एक वाईट युक्ती करून, अल्लाहच्या हुकूमाचे उल्लंघन केले; की खड्डे खोदून घेत, की मासे त्यांत अडकून रहावेत; मग जेव्हाशनिवारचा दिवस निघून जाई, तर मग त्यांना पकडून घेत.
५) या गटाने नेक लोकांचा तो गट अभिप्रेत आहे, जो या कुकर्माचा प्रयत्न पण करीत नव्हता आणि असे करणाऱ्यांना समजाऊन समजाऊन त्यांच्यात सुधारणेकडून निराशपण होऊन गेला होता. तथापि आणखीही काही लोक समजावणारे होते; जे त्यांना हितोपदेश करत असत. नेक आणि चांगल्या लोकांचा हा गट, त्यांना असे सांगत की अशा लोकांना हितोपदेश करून काय फायदा, ज्यांच्या नशिबी, अल्लाहची शिक्षा आणि नष्ट होणे आहे. किंवा या गटाने, तेच आज्ञाभंजक आणि मर्यादेचे उल्लंघन करणारे अभिप्रेत आहेत,जेव्हा त्यांना हितोपदेश करणारे, उपदेश करीत तेव्हा हे म्हणत, की जेव्हा तुमच्या विचारांत नष्ट होणे किंवा अल्लाहची शिक्षा,आमच्या नशीबी आहे तर मग आम्हाला का उपदेश करता? तर ते उत्तर देत की एक तर अपल्या पालनकर्त्यासमोर आपल्या माफीला पुढे करण्यासाठी की, आम्ही अल्लाहच्या पकडीपासून सुरक्षित रहावे. कारण की अल्लाहच्या आज्ञाभंजकाचा प्रयत्न होतांना पहाणे; आणि मग त्याला प्रतिबंध न करणेपण अपराध आहे. ज्यावर अल्लाहतआलाची पकड होऊ शकते, आणि दुसरा फायदा हा आहे की, कदाचित् हे लोक अल्लाहच्या हूकूमाचे उल्लंघन करण्यापासून परावृत्तच होऊन जातील. पहिल्या भाष्याच्या अनुषंगाने, हे तीन गट झालेत. १) आज्ञाभंजक आणि शिकार करणारा गट २) तो गट जो बिलकुल अलिप्त होऊन गेला. न तो आज्ञाभंजकात होता न मना करणाऱ्यात होता. ३) तो गट जो आज्ञाभंजकात नव्हता; आणि बिलकुल अलिप्त पण नव्हता; किंबहुना आज्ञाभंजकास मना करीत होता. दुसऱ्या भाष्याच्या अनुषंगाने, हे दोन गट होतील; एक आज्ञाभंजकाचा, दुसरा (त्यांना) मना करणाऱ्यांचा.
६) म्हणजे हितोपदेशाची त्यांनी काही पर्वा केली नाही. आणि आज्ञाभंग करण्यावर अडून राहिले.
७) म्हणजे ते जुलुमी पण होते, अल्लाहतआलाची नाफरमानी करून, त्यांनी आपल्या जिवावर जुलूम केला. आणि त्यांना (म्हणजे आपल्या जिवांना) नरकाग्नीचे इंधन बनवून घेतले; आणि आज्ञाभंजकपण; की अल्लाहच्या हुकूमांच्या विरूद्ध बंड करण्याला, त्यांनी आपली पद्धत आणि चाल बनवून घेतली.
८) 'अतौ' चा अर्थ आहे, ज्यांनी अल्लाहच्या आज्ञाभंगात, मर्यादेचे उल्लंघन केले. भाष्यकारांमध्ये या गोष्टीत मतभेद आहेत की, मुक्ती मिळवणारे फक्त तेच होते, जे त्यांना मना करीत होते आणि बाकी दोन्ही (समूह) अल्लाहच्या शिक्षेत पकडले गेले? किंवा अल्लाहच्या शिक्षेत पकडले गेलेले फक्त गुन्हेगार होते? बाकी दोन समूह मुक्ती मिळवणारे होते? इमाम इब्ने कसीरने दुसऱ्या मताला दुजोरा दिला आहे.
९) 'तअज्जना,' इजान, माहित करून देणे, सूचित करून देण्याच्या अर्थात म्हणजे तो वेळ पण आठवा, जेव्हा आपल्या पालनकर्त्याने, या यहूद्यांना चांगल्या प्रकारे याची जाणीव करून दिली होती, किंवा सूचित करून दिले होते, 'लयब्असन्न' मध्ये लाम ताकीदसाठी आहे जो शपथेसारखा उपयोगात आणला जातो. म्हणजे शपथ खाऊन, सक्त ताकीद देऊन, अल्लाहतआला फर्मावित आहे की, तो त्यांच्यावर कयामत पर्यंत, अशा लोकांना नेमत राहील, जे यांना कडक शिक्षेत व्यस्त ठेवतील. म्हणूनच यहूद्यांचा पूर्ण इतिहास या फजिती, दारिद्र्य आणि गुलामी व दुसऱ्यांच्या हुकूमाअधीन राहण्याचा इतिहास आहे. ज्याची माहिती अल्लाहतआलाने या महावाक्यांत दिली आहे. इस्राईलची सध्या असलेली सत्ता, कुरआनाच्या वर्णन केलेल्या, या वास्तवाच्या विरूद्ध नाही. याकरीता की ते कुरआनानेच सांगितलेल्यापेक्षा वेगळी नाही. आणि 'हबलीन् मिनन् नास' ची द्योतक आहे. जी कुरआनाच्या गोष्टीच्या विरूद्ध नाही; किंबहुना त्याला अनुसरूनच आहे. (तपशीलासाठी पहावे सू.आलेइम्रान ११२ चा समास)
१०) म्हणजे यांच्यातून कोणी तौबा करून मुसलमान होऊन जाईल, तर तो या मानहानी आणि शिक्षेच्या पकडीतून वाचून जाईल.
११) यांत यहूद्यांच्या वेगवेगळ्या समूहात विभागून जाणे; आणि यांच्यातून काहीचे सदाचरणी होण्याचा उल्लेख आहे आणि या दोन्ही पद्धतीने अजमाविले जाण्याचा उल्लेख आहे, की कदाचित ते आपल्या खोडसाळ वृत्तीपासून परावृत्त होतील; आणि अल्लाहकडे वळतील.

فَخَلَفَ مِنْۢ بَعْدِهِمْ خَلْفٌ وَّرِثُوا الْكِتٰبَ يَاْخُذُوْنَ عَرَضَ هٰذَا الْاَدْنٰى وَيَقُوْلُوْنَ سَيُغْفَرُ لَنَا ۚ وَاِنْ يَّاْتِهِمْ عَرَضٌ مِّثْلُهٗ يَاْخُذُوْهُ ؕ اَلَمْ يُؤْخَذْ عَلَيْهِمْ مِّيْثَاقُ الْكِتٰبِ اَنْ لَّا يَقُوْلُوْا عَلَى اللّٰهِ اِلَّا الْحَقَّ وَدَرَسُوْا مَا فِيْهِ ؕ وَالدَّارُ الْاٰخِرَةُ خَيْرٌ لِّلَّذِيْنَ يَتَّقُوْنَ ؕ اَفَلَا تَعْقِلُوْنَ ﴿١٦٩﴾

**मग त्यांच्यानंतर असे लोक त्यांच्या जागी आले(१); की पुस्तक त्यांच्याकडून मिळवले; या कनिष्ठ जगाची मालमत्ता घेऊन घेतात(२); आणि म्हणतात की, आम्हाला जरूर क्षमा करून टाकले जाईल(३); वास्तविक जर त्यांच्याजवळ तशीच मालमत्ता येऊ लागेल, तर तिलापण घेऊन घेतील. काय त्यांच्याकडून या पुस्तकाच्या या विषयाचा करार घेतला गेला नाही की, अल्लाहकडे शिवाय सत्त्य गोष्टीच्या आणखी कोण्या गोष्टीचा संबंध जोडू नये(४). आणि त्यांनी या पुस्तकांत जे काही होते, त्याला वाचून घेतले(५); आणि परलोकाचे घर, त्या लोकांसाठी उत्तम आहे जे ईशभय बाळगतात, मग काय तुम्ही समजत नाही? (१६९)**

وَالَّذِيْنَ يُمَسِّكُوْنَ بِالْكِتٰبِ وَاَقَامُوا الصَّلٰوةَ ؕ اِنَّا لَا نُضِيْعُ اَجْرَ الْمُصْلِحِيْنَ ﴿١٧٠﴾

**आणि जे लोक पुस्तकाला दृढपणे धरून आहेत, आणि नमाज पढतात. आम्ही अशा लोकांचा जे आपल्यांत सुधारणा करतील, (त्यांचा) प्रतिफळ वाया जाऊ देणार नाही(६) (१७०)**

وَاِذْ نَتَقْنَا الْجَبَلَ فَوْقَهُمْ كَاَنَّهٗ ظُلَّةٌ وَّظَنُّوْۤا اَنَّهٗ وَاقِعٌۢ بِهِمْ ۚ خُذُوْا مَاۤ اٰتَيْنٰكُمْ بِقُوَّةٍ وَّاذْكُرُوْا مَا فِيْهِ لَعَلَّكُمْ تَتَّقُوْنَ ﴿١٧١﴾

**आणि (ती वेळ सुद्धा उल्लेख करण्यायोग्य आहे), जेव्हा आम्ही पर्वताला उचलून छत्रासारखे त्यांच्यावर लोंबकळत ठेवले; आणि त्यांना भरोसा पटला की, आता (तो) त्यांच्यावर पडलाच पडला आणि (म्हटले की) जे पुस्तक आम्ही तुम्हास दिले आहे, त्याला मजबुतीने घट्ट धरून ठेवा. आणि लक्षात ठेवा जे आदेश याच्यात आहेत, त्याच्याने आशा आहे की, तुम्ही अल्लाहला भिऊन वागू लागाल(७) (१७१)**

وَاِذْ اَخَذَ رَبُّكَ مِنْۢ بَنِيْۤ اٰدَمَ مِنْ ظُهُوْرِهِمْ ذُرِّيَّتَهُمْ وَاَشْهَدَهُمْ عَلٰۤى اَنْفُسِهِمْ ۚ اَلَسْتُ بِرَبِّكُمْ ؕ قَالُوْا بَلٰى ۛۚ شَهِدْنَا ۛۚ اَنْ تَقُوْلُوْا يَوْمَ الْقِيٰمَةِ اِنَّا كُنَّا عَنْ هٰذَا غٰفِلِيْنَ ﴿١٧٢﴾

**आणि जेव्हा आपल्या पालनकर्त्याने, आदमाच्या मुलांच्या पाठीतून त्याच्या मुलांना काढले, आणि त्यांच्याकडून त्यांच्याशीच संबंधीत वचन घेतले, काय मी तुमचा पालनकर्ता नाही? सर्वांनी उत्तर दिले (की) का नाही, आम्ही सर्व साक्षीदार बनतो(८); कारण की तुम्ही लोकांनी कयामतच्या दिवशी, असे म्हणू नये, आम्ही तर यापासून गाफीलच राहिलो (१७२)**

اَوْ تَقُوْلُوْۤا اِنَّمَاۤ اَشْرَكَ اٰبَآؤُنَا مِنْ قَبْلُ وَكُنَّا ذُرِّيَّةً مِّنْۢ بَعْدِهِمْ ۚ اَفَتُهْلِكُنَا بِمَا فَعَلَ الْمُبْطِلُوْنَ ﴿١٧٣﴾

**किंवा असे म्हणावे की, पहिल्या पहिल्यांदा शिर्क तर आमच्या वाडवडीलांनी केले, आणि आम्ही त्यांच्यानंतर त्यांच्या वंशातून झालो; तर काय त्यांच्या चुकीच्या मार्गाच्या कर्माबद्दल तूआम्हास नष्ट करून टाकणार(९)? (१७३)**

وَكَذٰلِكَ نُفَصِّلُ الْاٰيٰتِ وَلَعَلَّهُمْ يَرْجِعُوْنَ ﴿١٧٤﴾

**आम्ही अशाचप्रकारे महावाक्यांना स्पष्ट स्पष्ट वर्णन करतो, की, कदाचित् हे लोक आमच्याकडे वळतील (१७४)**

१) 'खलफ' (लाम वर जबर सह) सदाचरणी संततीला आणि 'खल्फ' (लाम जजम सह) नालायक संतती ला म्हणतात, उर्दू भाषेत सुद्धा नाखलफ, नालायक संतती च्या अर्थांत वापरण्यांत येते.

२) अदना, दुनुव्वून (जवळ) ने घेतला गेला आहे. म्हणजे जवळची संपत्ती मिळवतात, ज्याच्याने इहलोक अभिप्रेत आहे किंवा हा 'दनाअतून' पासून काढला गेला आहे. ज्याच्याने अभिप्रेत क्षुल्लक आणि टाकाऊ वस्तू आहेत. म्हणजे दोन्ही कडून त्यांच्या ऐहिक मालमत्तेच्या मोहाचे स्पष्टीकरण आहे.

३) म्हणजे इहलोकाचे इच्छुक असून सुद्धा, क्षमेची आशा बाळगतात; जशी आज कालच्या मुसलमानांची पण स्थिती आहे.

४) असे असून सुद्धा ते अल्लाहकडे खोट्या गोष्टी लावण्यापासून माघार घेत नाही. उदाहरणार्थ तीच क्षमेची गोष्ट जी वर येऊन गेली.

५) याचा एक दुसरा भावार्थ 'मिटवणे' पण होऊ शकतो. ''दरसती रिहूल् आसार'' (वाऱ्याने निशाण्या मिटवून टाकल्या) म्हणजे पुस्तकाच्या गोष्टींना मिटवून टाकले. म्हणजे त्यांच्यावर अंमलबजावणी करणे सोडून दिले.
६) या लोकांतून जे ईशभयाचा मार्ग अनुसरतील, पुस्तकाला घट्ट धरून ठेवतील, ज्याच्याने अभिप्रेत मूळ तौरात आहे. आणि ज्यावर अंमलबजावणी करीत ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान घेऊन येतील, नमाज वगैरेला कायम करतील, तर अल्लाह अशा सुधारणा करणाऱ्याचा, मोबदला वाया जाऊ देणार नाही. यांत त्या ग्रंथधारी लोकांचा (मागील वर्णनाने येथे खास करून यहूद) उल्लेख आहे. जे ईशभय व कुरआनला घट्ट धरून ठेवणे, आणि नमाज कायम करतील; आणि त्यांच्यासाठी परलोकाची खुषखबर आहे. याचा अर्थ आहे की, त्यांनी मुसलमान होऊन जावे. आणि ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान घेऊन यावे. कारण की, आता शेवटच्या काळांतील पैगंबर ह.मुहम्मद मुस्तफा ﷺ वर ईमान आणल्याशिवाय परलोकांत मुक्ती शक्य नाही.
७) ही त्यावेळची घटना आहे, जेव्हा ह.मूसा عليه السلام यांच्याजवळ तौरात घेऊन आले; आणि त्यांचे आदेश त्यांना ऐकविले, तेव्हा त्यांनी त्यांच्या सवयीनुसार त्यावर अंमल करण्यास नकार आणि आक्षेप घेतला. ज्यावर अल्लाहतआलाने त्यांच्यावर पर्वताला उंच उभारून दिले की, तुमच्यावर पाडून तुम्हांस चेंगरून टाकण्यात येईल. ज्याला भिऊन त्यांनी तौरातवर अमलबजावणी करण्याचे वचन दिले. काही म्हणतात की, पर्वताला त्यांच्यावर उभारण्याची ही घटना त्यांच्या मागणीनुसार सादर झाली; जेव्हा त्यांनी सांगितले की, आम्ही तौरातवर अमल त्यावेळेस करू, जेव्हा अल्लाहतआला पर्वताला आमच्यावर उभारून दाखवेन. परंतु पहिली गोष्ट जास्त बरोबर वाटते. वल्लाह् अअ्लम. येथे केवळ पर्वताचा उल्लेख आहे. परंतु याच्या पूर्वी सू.बकरः आ. ६३ ते आ.९३ मध्ये दोन्ही जागी या घटनेचा उल्लेख आला आहे. तेथे त्याचे नांव स्पष्टपणे तूर पर्वत दाखविण्यात आले आहे.
८) हे वचन 'अलस्त' म्हणविले जाते. जे 'अलस्तो बिर रब्बिकुम' पासून बनले आहे. हे वचन ह. आदम عليه السلام च्या निर्मितीनंतर, त्यांच्या पाठीतून निर्माण होणाऱ्या सर्व संततीपासून घेण्यात आले. याचा तपशिल एका सहीह हदीसप्रमाणे असा येतो की, अर्फ्याच्या दिवशी, नोअमान जागी अल्लाहतआलाने, आदम عليه السلام च्या पाठीकडून वचन घेतले; म्हणजे आदम عليه السلام च्या पाठीतून त्यांच्या होणाऱ्या सर्व संततीला काढले, आणि त्यांना आपल्या समोर पसरवून दिले. आणि त्यांना विचारले ''काय मी तुमचा पालनकर्ता नाही? सगळ्यांनी सांगितले ''बला शहीदना'' का नाही? आम्ही सर्व पालनकर्ता होण्याची साक्ष देतो.'' (मुसनद अहमद, हाकीम) इमाम शौकानी या हदीसच्या बाबतीत लिहितात, ''हिच्या सनदीत काही आक्षेप नाही.'' (फत्हुल कदीर) तसेच इमाम शौकानी म्हणतात, ती वेळ आलमे जुर म्हणविले जाते. याचे हेच भाष्य बरोबर आणि खरे आहे. त्याच्याकडून तोंड फिरवून घेणे किंवा दुसऱ्या भावार्थाकडे जाणे बरोबर नाही. कारण की, मरफ़ुअ हदीस आणि सहाबा رضي الله عنهم च्या म्हणण्याप्रमाणे सिद्ध आहे. आणि त्याला हकीकती विरुद्ध मानणे पण योग्य नाही.'' तथापि अल्लाहच्या पालनकर्ता होण्याची ही साक्ष प्रत्येक माणसाच्या स्वभावातच समाविष्ट आहे. याच विषयाला रसूल ﷺ नी अशा प्रकारे वर्णन केले आहे की, ''प्रत्येक मूल, नैसर्गिक अवस्थेवर जन्माला येते. मग त्याचे आईबाप त्याला, यहूदी किंवा खिस्ती किंवा अग्नीपुजक बनवून देतात. ज्याप्रमाणे जनावरांचे वासरू भले चंगे आणि तंदुरूस्त जन्माला येते त्याचे नाक किंवा कान कापलेले नसतात.'' (स. बुखारी व स. मुस्लीम) आणि सहीह मुस्लीम ची रिवायत आहे, अल्लाहतआला फर्मावितो की, ''मी आपल्या सेवकांना हनीफ (अल्लाहकडे एकाग्रतेने वळणारा) निर्माण केला आहे. मग शैतान त्यांना त्यांच्या स्वाभाविक धर्माकडून आडमार्गी भटकवून देतो.'' (स. मुस्लीम) ही नैसर्गिक प्रवृत्ती किंवा नैसर्गिक धर्म, हाच 'रब' चा एकेश्वरवाद आणि त्याने अवतरीत केलेले धर्मशास्त्र आहे. जे आता इस्लामच्या स्वरूपात सुरक्षित आणि अस्तित्वात आहे.
९) म्हणजे आम्ही हे वचन घेणे, आणि आपला पालनकर्ता होण्याची साक्ष, यासाठी घेतली की, ही सबब पुढे न केली जावी, की आम्ही तर अनभिज्ञ होतो, किंवा आमचे वाडवडील शिर्क करीत आले होते, ही सबब कयामतच्या दिवशी, अल्लाहच्या दरबारात ऐकून घेतली जाणार नाही.

وَاتْلُ عَلَيْهِمْ نَبَاَ الَّذِيْٓ اٰتَيْنٰهُ اٰيٰتِنَا فَانْسَلَخَ مِنْهَا فَاَتْبَعَهُ الشَّيْطٰنُ فَكَانَ مِنَ الْغٰوِيْنَ ﴿١٧٥﴾

आणि या लोकांना त्या माणसाचा वृत्तांत वाचून ऐकवा; की ज्याला आम्ही आपले निशाण्या दिले, मग तो त्यापासून बिलकुल निघून गेला; मग शैतान त्याच्यामागे लागून गेला, तर तो आडमार्गी भटकणाऱ्या लोकांमध्ये शामील होऊन गेला[१] (१७५)

وَلَوْ شِئْنَا لَرَفَعْنٰهُ بِهَا وَلٰكِنَّهٗٓ اَخْلَدَ اِلَى الْاَرْضِ وَاتَّبَعَ هَوٰىهُ ۚ فَمَثَلُهٗ كَمَثَلِ الْكَلْبِ ۚ اِنْ تَحْمِلْ عَلَيْهِ يَلْهَثْ اَوْ تَتْرُكْهُ يَلْهَثْ ؕ ذٰلِكَ مَثَلُ الْقَوْمِ الَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا ۚ فَاقْصُصِ الْقَصَصَ لَعَلَّهُمْ يَتَفَكَّرُوْنَ ﴿١٧٦﴾

आणि जर आम्ही इच्छितो तर, त्याला निशाण्यांमुळे त्याला उच्चपद देतो. परंतु तो तर दुनियेकडेच झुकून राहिला. आणि आपल्या मनोकामनेचे अनुकरण करू लागला; तर त्याची स्थिती कुत्र्यासारखी होऊन गेली; की जर तू त्याला हांकशील तेव्हा सुद्धा तो जीभ बाहेर काढेल, आणि जर तू त्याला (त्याच्याच) स्थितीवर सोडून देशील, तरीही तो जीभ बाहेर काढील[२]. हीच स्थिती त्या लोकांची आहे, ज्यांनी आमच्या निशाण्यांना खोटे ठरविले. म्हणून आपण या स्थितीला वर्णन करून द्या; की कदाचित् ते काही विचार करतील[३] (१७६)

سَآءَ مَثَلَا ۨالْقَوْمُ الَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا وَاَنْفُسَهُمْ كَانُوْا يَظْلِمُوْنَ ﴿١٧٧﴾

त्या लोकांची स्थिती पण वाईट स्थिती आहे; जे आमच्या निशाण्यांना खोट्या म्हणतात, आणि ते आपलेच नुकसान करतात (१७७)

مَنْ يَّهْدِ اللّٰهُ فَهُوَ الْمُهْتَدِيْ ۚ وَمَنْ يُّضْلِلْ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْخٰسِرُوْنَ ﴿١٧٨﴾

ज्याला अल्लाह हिदायत देतो, तर हिदायत प्राप्त करणारा तोच असतो. आणि ज्याला तो मार्गभ्रष्ट करून टाकेन, तर असेच लोक तोटयांत पडणारे आहेत (१७८)

وَلَقَدْ ذَرَاْنَا لِجَهَنَّمَ كَثِيْرًا مِّنَ الْجِنِّ وَالْاِنْسِ ۖ لَهُمْ قُلُوْبٌ لَّا يَفْقَهُوْنَ بِهَا ۫ وَلَهُمْ اَعْيُنٌ لَّا يُبْصِرُوْنَ بِهَا ۫ وَلَهُمْ اٰذَانٌ لَّا يَسْمَعُوْنَ بِهَا ؕ اُولٰٓئِكَ كَالْاَنْعَامِ بَلْ هُمْ اَضَلُّ ؕ اُولٰٓئِكَ هُمُ الْغٰفِلُوْنَ ﴿١٧٩﴾

आणि आम्ही पुष्कळशी जिन्न आणि माणसे नरकाग्नी साठीच निर्माण केली आहेत[४]; ज्यांची अंत:करणे अशी आहेत, ज्याच्याने ते समजत नाहीत, आणि ज्यांचे डोळे असे आहेत, ज्याच्याने ते पहात नाहीत; आणि ज्यांचे कान असे आहेत, ज्याच्याने ते ऐकत नाहीत; हे लोक चतुष्पादांसारखे आहेत, किंबहुना त्यांच्या पेक्षा जास्त मार्गभ्रष्ट आहेत[५]. हेच लोक अनभिज्ञ आहेत (१७९)

وَلِلّٰهِ الْاَسْمَآءُ الْحُسْنٰى فَادْعُوْهُ بِهَا ۪ وَذَرُوا الَّذِيْنَ يُلْحِدُوْنَ فِيْٓ اَسْمَآئِهٖ ؕ سَيُجْزَوْنَ مَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿١٨٠﴾

आणि सुंदर सुंदर नावे अल्लाहसाठीच आहेत; तर त्याच नावांनी अल्लाहला पुकारित जा[६], आणि अशा लोकांशी संबंध पण ठेवू नका जे त्याच्या नावांत वक्रता आणतात[७]. यांना त्यांच्या कृत्याची जरुर शिक्षा मिळेल (१८०)

٢٢ ع ١٠ ١٢
२२ १० १२

وَمِمَّنْ خَلَقْنَآ اُمَّةٌ يَّهْدُوْنَ بِالْحَقِّ وَبِهٖ يَعْدِلُوْنَ ﴿١٨١﴾

आणि आमच्या सृष्टीत एक समूह असापण आहे, जो सत्याला अनुसरून मार्गदर्शन करतो. आणि त्याला अनुसरून न्यायनिवाडा पण करतो (१८१)

وَالَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا سَنَسْتَدْرِجُهُمْ مِّنْ حَيْثُ لَا يَعْلَمُوْنَ ﴿١٨٢﴾

आणि जे लोक आमच्या निशाण्यांना नाकारतात, त्यांना आम्ही अशा पद्धतीने हळूहळू(नरकाग्नीकडे) घेऊन जात आहोत, की त्यांना त्याची जाणिव पण होणार नाही (१८२)

وَاُمْلِيْ لَهُمْ ۟ اِنَّ كَيْدِيْ مَتِيْنٌ ﴿١٨٣﴾

आणि त्यांना अवकाश देतो; नि:संशय माझा डाव मोठा मजबूत आहे[८] (१८३)

१) भाष्यकारांनी याला कोण्या एका खास माणसांशी संबंधित ठरवले आहे; ज्याला अल्लाहच्या पुस्तकाचे ज्ञान प्राप्त होते. परंतु नंतर तो दुनिया आणि शैतानाच्या मागे लागून, मार्गभ्रष्ट होऊन गेला. तथापि या बाबतीत कोणी ठोस गोष्ट उल्लेखांत नाही .म्हणून याच्यात आणि चौकशी करण्याची आवश्यकता नाही. हे सर्व साधारण आहे; आणि अशी माणसे प्रत्येक उम्मतमध्ये, आणि प्रत्येक काळात होत आले आहेत. जो पण या वैशिष्ट्याने युक्त असेल. तो यास पात्र ठरेल.

२) 'लहस' म्हणतात थकवा किंवा तहान वगैरे कारणाने जीभेला बाहेर काढण्याला; कुत्र्याची ही सवय आहे की, तुम्ही त्याला रागवा, त्याच्यावर जोरांत ओरडा, किंवा त्याला त्याच्याच स्थितीवर सोडून द्या; दोन्ही अवस्थेत तो भुंकणे बंद

करीत नाही. त्याचप्रमाणे त्याची ही सवयपण आहे की, तो पोट भरलेला असो किंवा उपाशी, चांगला तंदुरूस्त किंवा आजारी, थकलेला भागलेला किंवा ताजा टवटवित, प्रत्येक स्थितीत जीभ बाहेर काढून धापा टाकत राहतो. हीच स्थिती अशा माणसाची आहे, ज्याला उपदेश करा अथवा करू नका, त्याची स्थिती सारखीच राहील. आणि दुनियेच्या मालमत्तेसाठी त्याची लाळ टपकून पडत राहील.

३) आणि अशा प्रकारच्या लोकांजवळून धडा घेऊन, मार्गभ्रष्टतेपासून वांचावे; आणि सत्त्याला अंगिकारावे.

४) याचा संबंध नशिबाशी आहे. म्हणजे प्रत्येक मनुष्य आणि जिन्नाच्या बाबतीत, अल्लाहला ज्ञान होते की, तो जगांत जाऊन चांगले किंवा वाईट कर्मे करील. याप्रमाणे त्याला लिहून ठेवले आहे. येथे त्याच नरकाग्नीत जाणाऱ्यांचा उल्लेख आहे; ज्यांना अल्लाहच्या ज्ञानाप्रमाणे, नरकाग्नीवाल्यांचीच कर्मे करावयाची होती. पुढे त्यांची आणखी वैशिष्टये वर्णन करून, दाखवून देण्यात आले की, ज्या लोकांमध्ये या गोष्टी अशा प्रकारे असतील, ज्याचा उल्लेख येथे केला गेला आहे; तर समजून घ्या की याचा परिणाम वाईट आहे.

५) म्हणजे अंत:करण, डोळे,कान या गोष्टी अल्लाहने यासाठी दिल्या आहेत की, मनुष्याने त्याच्यापासून फायदा उचलत आपल्या पालनकर्त्याला समजावे; त्याच्या निशाण्यांना प्रत्यक्ष पहावे. आणि सत्य गोष्टीला काळजीपूर्वक ऐकावे. परंतु जो मनुष्य या गोष्टीपासून हे काम घेत नाही, तो जणू यांच्यापासून फायदा न उचलणाऱ्यांमध्ये, चतुष्पांदासारखा किंबहुना त्यांच्यापेक्षा जास्त मार्गभ्रष्ट आहे. यासाठी की, चतुष्पाद तर, तरी सुद्धा, आपल्या नफा नुकसानाची काही जाणीव ठेवतात. आणि फायदा देणाऱ्या वस्तुंपासून, फायदा उचलतात; आणि नुकसान करणाऱ्या गोष्टीपासून वाचून राहतात. परंतु, अल्लाहच्या मार्गदर्शनापासून तोंड फिरवणाऱ्या माणसातून तर हे योग्यायोग्य ठरविण्याचे कौशल्यच संपून जाते की, त्याच्यासाठी फायदेकारक कोणती गोष्ट आहे, आणि हानिकारक कोणती? म्हणूनच पुढच्या महावाक्यांत त्यांना बेपर्वा पण म्हटले गेले आहे.

६) 'हुसना' 'अहसन' ची 'तानियस' आहे. अल्लाहच्या या चांगल्या नावांनी अभिप्रेत ती अल्लाहची नांवे आहेत, ज्याच्याने त्याची वेगवेगळी वैशिष्टये, त्याची महत्ता आणि शान, आणि त्याचे सामर्थ्य आणि शक्तीचे प्रदर्शन होते. सहीहैनच्या हदीसमध्ये, त्यांची संख्या ९९ (एक कमी शंभर) दाखविण्यात आली आणि सांगितले की, जो यांना मोजत राहील, स्वर्गात प्रवेश करेल, अल्लाहतआला विषम आहे, विषमला पसंत करीतो (स. बुखारी, स. मुस्लीम) मोजणी करण्याचा अर्थ हाच वाटतो की, त्यावर ईमान आणणे अथवा त्यांची मोजणी करणे आणि त्यांना एक-एक करून त्यापासून फायदा मिळविण्यासाठी भक्तिभावाने वाचणे अथवा त्यांना पाठ करणे, त्यांचे अर्थ समजून घेणे आणि त्यांच्यापासून स्वत: मध्ये परिवर्तन करून त्याच्यासारखे वैशिष्टये निर्माण करणे यांच्या मार्फत दुआ मागितली जावी. काही उल्लेखांमध्ये, या ९९ नावाचा उल्लेख केला गेला आहे; परंतु या रिवायती 'जअीफ' आहेत. जो नबी ﷺ च्या हदीशीचा भाग नाही. तसेच उलमांनी हे पण स्पष्टीकरण केले आहे की, अल्लाहतआलाच्या नावांची संख्या ९९ मध्ये मर्यादीत नाही. किंबहुना याच्यापेक्षा जास्त आहेत. (इब्ने कसीर व फत्हुल कदीर)

७) 'इलहाद' चा अर्थ आहे कुण्या एका बाजुला वळणे, याच्यापासून 'लहद' आहे, जे त्या कबरीला म्हणतात, जी एका बाजुला बनविली जाते. धर्मामध्ये 'इलहाद' अंगिकारण्याचा अर्थ वाकडेपणा आणि मार्गभ्रष्टता अंगिकारणे आहे. अल्लाहतआलाच्या नावात 'इलहाद' (वक्रता) ची तीन स्वरूपे आहेत. १) अल्लाहतआलाच्या नावात बदल करून टाकला जावा. जसे बहुदेववाद्यांनी केले. जसे अल्लाहच्या वैयक्तिक नावांशी, आपल्या एका मूर्तीचे नांव 'लात्' आणि त्याचे विशेष नांव, 'अजीज' ने 'उज्जा' आणि 'मन्नान' ने 'मनात' (मुर्तीची नांवे) बनवून घेतले. २) किंवा अल्लाहच्या नावात आपल्याकडून वाढ करून घेणे; ज्याचा हुकूम अल्लाहने दिला नाही. ३) किंवा त्याच्या नावामध्ये कमी करून देणे; उदाहरणार्थ त्याला कोणी खास नावानेच पुकारले जावे. आणि दुसऱ्या विशेष नावांनी पुकारण्याला वाईट समजण्यात यावे (फत्हुल कदीर) अल्लाहच्या नावामध्ये 'इलहाद'चा एकप्रकार हा सुद्धाआहे त्यांच्यात उघड अर्थापासून फिरवून देणे किंवा समानता दाखवणे.(अयसरू त्तफासीर) ज्याप्रमाणे मुअतज़ेला, मुअत्तिला आणि मुशब्बेहा वगैरे मार्गभ्रष्ट पंथांची पद्धत राहिली आहे. अल्लाहने हुकूम दिला की, या सर्वांपासून वाचून रहा.

८) ह्या त्याच अद्भुत गोष्टी आणि ढिल देणे आहे, ज्या परीक्षा घेण्यासाठी अल्लाहतआला व्यक्तींना आणि समूहांना देतो. मग जेव्हा त्याची इच्छा पकडण्याची होते, तर कोणी त्यापासून वाचण्यास समर्थ होऊ शकत नाही; कारण की, त्याचा डाव फार मजबूत असतो.

اَوَلَمْ يَتَفَكَّرُوْا ۜ مَا بِصَاحِبِهِمْ مِّنْ جِنَّةٍ ؕ اِنْ هُوَ اِلَّا نَذِيْرٌ مُّبِيْنٌ ۝١٨٤

काय या लोकांनी या गोष्टीचे मनन केले नाही, की त्यांच्या साथीदारांना जरा पण वेड नाही; ते तर फक्त एक स्पष्ट स्पष्ट भिवविणारे आहेत[१] (१८४)

اَوَلَمْ يَنْظُرُوْا فِيْ مَلَكُوْتِ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا خَلَقَ اللّٰهُ مِنْ شَيْءٍ ۙ وَّاَنْ عَسٰۤى اَنْ يَّكُوْنَ قَدِ اقْتَرَبَ اَجَلُهُمْ ۚ فَبِاَيِّ حَدِيْثٍۭ بَعْدَهٗ يُؤْمِنُوْنَ ۝١٨٥

आणि काय या लोकांनी अवलोकन केले नाही? आकाश व पृथ्वीच्या व्यवस्थेत, आणि दुसऱ्या वस्तूंत ज्या अल्लाहने निर्माण केल्या आहेत. आणि या गोष्टीत की, त्यांचा (मरण) काळ जवळच येऊन ठेपला असेल[२]; मग कुरआनानंतर कोणत्या गोष्टीवर हे लोक ईमान आणतील?[३] (१८५)

مَنْ يُّضْلِلِ اللّٰهُ فَلَا هَادِيَ لَهٗ ؕ وَيَذَرُهُمْ فِيْ طُغْيَانِهِمْ يَعْمَهُوْنَ ۝١٨٦

ज्याला अल्लाहतआला मार्गभ्रष्ट करून टाकील, त्याला कोणी (सरळ) मार्गावर आणू शकत नाही. आणि अल्लाहतआला त्यांना त्यांच्या मार्गभ्रष्टतेत भटकलेले सोडून देतो (१८६)

يَسْـَٔلُوْنَكَ عَنِ السَّاعَةِ اَيَّانَ مُرْسٰىهَا ؕ قُلْ اِنَّمَا عِلْمُهَا عِنْدَ رَبِّيْ ۚ لَا يُجَلِّيْهَا لِوَقْتِهَاۤ اِلَّا هُوَ ؔۘ ثَقُلَتْ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ لَا تَاْتِيْكُمْ اِلَّا بَغْتَةً ؕ يَسْـَٔلُوْنَكَ كَاَنَّكَ حَفِيٌّ عَنْهَا ؕ قُلْ اِنَّمَا عِلْمُهَا عِنْدَ اللّٰهِ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُوْنَ ۝١٨٧

हे लोक आपणांस कयामतच्या[४] बाबतीत प्रश्न विचारतात, की ती केव्हा येईल[५]; आपण सांगून टाका की याचे ज्ञान फक्त माझ्या पालनकर्त्याजवळच आहे[६]. तिच्या वेळेवर तिला अल्लाहच्या शिवाय आणखी कोणी जाहीर करणार नाही; ती आकाशात आणि पृथ्वीत मोठी भारी आपत्ती असेल; ती[७] तुमच्यावर अचानक येऊन कोसळेल. ते आपणांस अशाप्रकारे विचारतात[८], जसे जणूआपण तिची चौकशी करून चुकला आहात. आपण सांगून टाका की, याचे ज्ञान खास अल्लाहजवळच आहे, परंतु बहुतेक लोक समजत नाही (१८७)

१) 'साहेब' ने अभिप्रेत, नबी करीम ﷺ चे आदरणीय व्यक्तीत्व आहे. ज्यांच्या बाबतीत मुशरिकीन कधी जादूगीर, कधी वेडा (नऊजो बिल्लाह!) म्हणत असत. अल्लाहतआलाने म्हटले हा तुमच्या मनन व चिंतन न करण्याचा परिणाम आहे. तो तर आमचा पैगंबर आहे, जो आमचे आदेश ऐकविणारा, आणि त्यांच्यापासून बेपरवाई व तोंड फिरवणाऱ्यांना भिवविणारा आहे.

२) अर्थ असा आहे की, जर या गोष्टीवर पण जर हे मनन करतील, तर खचितच् हे अल्लाहवर ईमान आणतील, त्याच्या पैगंबराला मान्य आणि त्याचे अनुपालन अंगिकारून घेतील. आणि त्यांनी जे अल्लाहचे सरकतदार बनवून ठेवले आहे; त्यांना सोडून द्यावे. आणि या गोष्टी पासून भ्यावे की, त्यांना मृत्यू अशा अवस्थेत यावा की, ते 'कुफ्र' वर कायम असावे.

३) हदीसने अभिप्रेत येथे कुरआन करीम आहे. म्हणजे नबी ﷺ च्या भिववणे व धमकावणे, आणि कुरआन करीमच्या नंतर सुद्धा हे ईमान आणणार नाही, तर यापेक्षा जास्त त्यांना भिवविणारी आणखी काय गोष्ट, असेल, जी अल्लाहकडून अवतरीत व्हावी, मग ते तिच्यावर ईमान आणतील?

४) 'साअत' चा अर्थ वेळ, (घटका किंवा क्षण) चा आहे. कयामतला 'साअत' यासाठी म्हटले आहे की, ही अचानक अशा प्रकारे येऊन जाईल की, क्षणभरात सर्व विश्व उलट पालट होऊन जाईल किंवा लवकर हिशेब घेण्याच्या अनुषंगाने कयामतच्या घटकेला 'साअत' म्हणण्यात आले आहे.

५) 'अर्सा युरसी' चा अर्थ घडणे आणि कायम होण्याचे आहे. म्हणजे केव्हा ही कयामत येईल किंवा घटीत होईल ?

६) म्हणजे याचे निश्चित ज्ञान न कोणी देवदूताला आहे, न कोण्या पैगंबराला. अल्लाहशिवाय याचे ज्ञान कोणालाही नाही; तोच तिला आपल्या वेळेवर जाहीर करेल.

७) याचा एक दुसरा अर्थपण आहे; याचे ज्ञान आकाश व पृथ्वीवाल्यावर अवघड आहे; कारण ते गुप्त आहे; आणि गुप्त गोष्ट मनावर अवघड असते.

८) 'हफीयुन' म्हणतात, मागे लागून प्रश्न करणे आणि शहानिशा करणाऱ्याला, म्हणजे हे आपणास ﷺ कयामतच्या बाबतीत अशा प्रकारे प्रश्न करतात की, जणू आपण ﷺ नी आपल्या पालनकर्त्याच्या मागे लागून, याबाबतीत आवश्यक ज्ञान प्राप्त करून ठेवले आहे.

قُلْ لَّآ اَمْلِكُ لِنَفْسِيْ نَفْعًا وَّلَا ضَرًّا اِلَّا مَا شَاۤءَ اللّٰهُ ۭ وَلَوْ كُنْتُ اَعْلَمُ الْغَيْبَ لَاسْتَكْثَرْتُ مِنَ الْخَيْرِ ۚ وَمَا مَسَّنِيَ السُّوْۗءُ ۚ اِنْ اَنَا اِلَّا نَذِيْرٌ وَّبَشِيْرٌ لِّقَوْمٍ يُّؤْمِنُوْنَ ١٨٨

**आपण सांगून टाका की, मी स्वत: आपल्यासाठी खास, फायद्याचा अधिकार बाळगत नाही. आणि न कोण्या नुकसानाचा; परंतु इतकाच की जितका अल्लाहने इच्छिला असेल. आणि जर मी अदृष्टाच्या गोष्टी जाणत असतो, तर मी बरेचसे फायदे मिळवून घेतले असते, आणि कोणी नुकसान पण माझे झाले नसते. मी तर केवळ भिवविणारा आणि खुषखबर देणारा आहे, त्या लोकांना, जे ईमान ठेवतात[१] १८८**

هُوَ الَّذِيْ خَلَقَكُمْ مِّنْ نَّفْسٍ وَّاحِدَةٍ وَّجَعَلَ مِنْهَا زَوْجَهَا لِيَسْكُنَ اِلَيْهَا ۚ فَلَمَّا تَغَشّٰىهَا حَمَلَتْ حَمْلًا خَفِيْفًا فَمَرَّتْ بِهٖ ۚ فَلَمَّآ اَثْقَلَتْ دَّعَوَا اللّٰهَ رَبَّهُمَا لَىِٕنْ اٰتَيْتَنَا صَالِحًا لَّنَكُوْنَنَّ مِنَ الشّٰكِرِيْنَ ١٨٩

**तो अल्लाहतआला असा आहे, ज्याने तुम्हास एका तनमनापासून निर्माण केले[२]; आणि त्याच्यापासून त्याचा जोडा[३] बनविला. कारण की त्याने आपल्या स्त्रीशी प्रेमाने नांदावे[४]; मग जेव्हा पतीने पत्नीशी जवळीक[५] केली, तर तिला हलकासा गर्भ राहिला. तेव्हा ती त्याला घेऊन चालत फिरत राहिली[६]. मग जेव्हा ती बोजड होऊन गेली, तेव्हा दोघे पती पत्नी अल्लाहजवळ, जो त्यांचा मालक आहे, दुआ करू लागले की, जर तू आम्हास जितेजागते मूल देऊन दिले, तर आम्ही खूप (तुझे) उपकार मानणारे होऊन जाऊ[७] १८९**

१) हे महावाक्य या बाबतीत किती स्पष्ट आहे की, नबी ﷺ अदृष्टाचे ज्ञाते नाहीत. 'अदृष्टाचा ज्ञाता' फक्त अल्लाहचीच व्यक्ती विशेष आहे. परंतु जुलूम आणि अडाणीपणाची कमाल आहे, की असे असून सुद्धा बिदअती लोक आपणांस ﷺ 'अदृष्टाचा ज्ञाता' ठरवितात. वास्तविक काही युद्धात आपले दात मुबारक सुध्दा पडले. आपला चेहरा मुबारक पण जखमी झाला. आणि आपण ﷺ नी सांगितले की हे लोक कसे सफल होतील, ज्यांनी आपल्या पैगंबरांच्या डोक्याला जखमी करून टाकले. (हदिशीच्या पुस्तकांत या घटना पण आणि खालील घटनापण नमुद आहेत.) ह.आयेशा رضي الله عنها वर आळ घेतला गेला, तेव्हा आपण ﷺ पूर्ण एक महिना व्याकूळ आणि सक्त परेशान राहिले. एका यहूदी स्त्रीने आपणास जेवणाचे आमंत्रण दिले; आणि जेवणात विष कालवून दिले; ज्याला आपण ﷺ नी पण खाल्ले. आणि सहाबांनी सुद्धा. येथपर्यंत की, काही सहाबा رضي الله عنه ते खाल्ल्याने हलाकपण झाले. आणि स्वत: नबी ﷺ ला आयुष्यभर या विषाचे परिणाम जाणवत राहिले. या आणि या सारख्या अनेक घटना आहेत; ज्याच्याने स्पष्ट होत आहे की, आपणास ठाऊक नसल्याने त्रास झाला; नुकसान सहन करावे लागले. ज्याच्याने कुरआनाच्या वर्णन केलेल्या वास्तविकतेला आधार मिळतो की, ''जर मी अदृष्ट जाणले असते, तर मला नुकसान सहन करावे लागले नसते.''

२) इबतेदा (आरंभ) म्हणजे ह.आदम عليه السلام पासून, म्हणूनच त्यांना पहिला मानव आणि मानवांचे पितामह म्हटले जाते.

३) याच्याने अभिप्रेत ह.हव्वा عليها السلام आहेत. ज्या ह. आदम عليه السلام च्या पत्नी बनल्यांत. यांची निर्मिती ह.आदम عليه السلام पासून झाली. (कृपया पहावे सू.निसा महावाक्य १ चा समास)

४) म्हणजे इच्यापासून संतोष आणि समाधान प्राप्त करावे. कारण की एक जात आपल्याच सारख्या जातीशी, खऱ्या अर्थाने परिचित आणि जवळीक साधू शकते; जे समाधान प्राप्त करण्यासाठी आवश्यक आहे. जवळीक शिवाय हे शक्यच नाही. दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने म्हटले आहे, ''अल्लाहच्या निशाण्यांमधून हे पण आहे की, त्याने तुमच्याकरीता, तुमच्यातूनच (किंवा तुमच्या जातीतून) जोडे निर्माण केले की, तुम्ही त्यांच्यापासून समाधान (सौख्य) प्राप्त करावे. आणि त्याने तुमच्या दरम्यान प्रीती निर्माण करून दिली.'' (सू.रूम-२१) म्हणजे अल्लाहने पुरूष आणि स्त्री दोघांत, एक दुसऱ्या विषयी ज्या भावना आणि आकर्षण ठेवले आहे, प्रकृतीच्या या मागण्या ते दांपत्य ( ouple ) बनून ते पूर्ण करतात; आणि एक दुसऱ्याशी सामिप्य आणि लगावाची भावना प्राप्त करतात; म्हणून ही वास्तविकता आहे,की जे आपसांतील प्रेम पती पत्नी मध्ये असते, ते जगांत कोण्या दुसऱ्या बरोबर आढळून येत नाही.

५) म्हणजे मनुष्याचा हा वंश अशाप्रकारे वाढला, आणि पुढे जाऊन, जेव्हा त्यांच्यातील दांपत्याने म्हणजे पती पत्नीने एक दुसऱ्याशी जवळीक साधली, 'तगश्शाहा' चा अर्थ पत्नीशी शैय्या सोबत करणे आहे. म्हणजे संभोग करण्यासाठी कवटाळले.

६) म्हणजे गर्भा (वस्था) च्या सुरवातीच्या दिवसात येथ पावेतो की, विर्य बिंदु पासून 'अलका' (गोठलेले रक्त) आणि 'अलका' पासून 'मुजगा' (मांसाचा गोळा) बनेपर्यंत, गर्भ हलकासाच असतो आणि स्त्रीला जास्त जडत्वपण वाटत नाही.

७) जड होऊन जाण्याने अभिप्रेत जेव्हा मूल पोटांत मोठे होऊन जाते, तर जसा जसा प्रसव काळ जवळ येत जातो, आईवडीलांच्या मनांत धोके आणि शंका कुशंका निर्माण होत जातात. तर मनुष्य स्वभाव आहे की, संकटकाळी तो अल्लाहकडे वळतो. म्हणून ते दोघे अल्लाहकडे दुआ करतात आणि आभार मानण्याचे वचन देतात.

فَلَمَّآ اٰتٰىهُمَا صَالِحًا جَعَلَا لَهٗ شُرَكَآءَ فِيْمَآ اٰتٰىهُمَا ۚ فَتَعٰلَى اللّٰهُ عَمَّا يُشْرِكُوْنَ ﴿١٩٠﴾

**मग जेव्हा अल्लाहने दोघांना जितेजागते मूल देऊन दिले, तेव्हा अल्लाहच्या दिलेल्या वस्तुंत ते दोघे, अल्लाहचे सरकतदार ठरवू लागले[१] तर अल्लाह श्रेष्ठ आहे, त्यांच्या 'शिर्क' पासून १९०**

اَيُشْرِكُوْنَ مَا لَا يَخْلُقُ شَيْـًٔا وَّهُمْ يُخْلَقُوْنَ ﴿١٩١﴾

**काय अशांना सरकतदार ठरवतात, जे कोण्या वस्तुला निर्माण शकत नाही. आणि ते स्वत:च निर्मिले गेलेले असावे १९१**

وَلَا يَسْتَطِيْعُوْنَ لَهُمْ نَصْرًا وَّلَآ اَنْفُسَهُمْ يَنْصُرُوْنَ ﴿١٩٢﴾

**आणि ते त्यांना कुठल्याही प्रकारची मदत देऊ शकत नाही; आणि ते स्वत: आपली मदत पण करू शकत नाही १९२**

وَاِنْ تَدْعُوْهُمْ اِلَى الْهُدٰى لَا يَتَّبِعُوْكُمْ ۭ سَوَآءٌ عَلَيْكُمْ اَدَعَوْتُمُوْهُمْ اَمْ اَنْتُمْ صَامِتُوْنَ ﴿١٩٣﴾

**आणि जर तुम्ही त्यांना सरळ मार्गाकडे बोलवाल; तर तुमच्या म्हणण्यावर चालणार नाही[२]. तुमच्या बाबतीत दोन्ही गोष्टी बरोबर आहेत, तुम्ही त्यांना बोलवा किंवा गुपचुप बसा १९३**

اِنَّ الَّذِيْنَ تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ عِبَادٌ اَمْثَالُكُمْ فَادْعُوْهُمْ فَلْيَسْتَجِيْبُوْا لَكُمْ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿١٩٤﴾

**खरोखर तुम्ही अल्लाहला सोडून ज्यांची उपासना करतात, ते पण तुमच्याच सारखे सेवक आहेत[३]. मग जर तुम्ही त्यांना बोलवाल तर त्यांना पाहिजे त्यांनी तुमचे म्हणणे पूर्ण करून घ्यावे, जर तुम्ही खरे आहात १९४**

اَلَهُمْ اَرْجُلٌ يَّمْشُوْنَ بِهَآ ۡ اَمْ لَهُمْ اَيْدٍ يَّبْطِشُوْنَ بِهَآ ۡ اَمْ لَهُمْ اَعْيُنٌ يُّبْصِرُوْنَ بِهَآ ۡ اَمْ لَهُمْ اٰذَانٌ يَّسْمَعُوْنَ بِهَا ۭ قُلِ ادْعُوْا شُرَكَآءَكُمْ ثُمَّ كِيْدُوْنِ فَلَا تُنْظِرُوْنِ ﴿١٩٥﴾

**काय त्याचे पाय आहेत, ज्याच्याने ते चालतात किंवा त्यांचे हात आहेत, ज्याने ते कोण्या वस्तुला धरू शकतील किंवा त्यांचे डोळे आहेत, ज्याच्याने ते पहात असतील, किंवा त्यांचे कान आहेत, ज्याने ते ऐकतात[४]; आपण सांगून टाका की, तुम्ही आपल्या सर्व सरकतदारांना बोलावून घ्या. मग माझे नुकसान करण्याचा प्रयत्न करा. मग मला जरा पण अवकाश देऊ नका[५] १९५**

१) सरकतदार ठरविण्याने अभिप्रेत एक तर मुलाचे नाव असे ठेवणे उदाहरणार्थ इमामबक्ष, पिराने दित्ता, अबदेशम्स, बंदाअली, वगैरे ज्याने हे जाहीर होत असेल, की हे मूल, अमुक बुजर्ग, अमुकपीर च्या (नऊजो बिल्लाह!) कृपाप्रसादाचा परिणाम आहे. किंवा मग आपल्या या श्रद्धेचे प्रदर्शन करून, आम्ही अमुक बुजुर्ग किंवा अमुक कबरीवर गेलो होतो, ज्याच्या परिणामात हे मूल जन्माला आले आहे, किंवा कोण्या मृताच्या नावाचा नवस फेडणे किंवा मुलाला कोण्या कबरीवर नेऊन, त्याचे डोके तेथे टेकवणे की, त्यांच्या कृपेने मूल झाले आहे. हे सर्व प्रकार अल्लाहचा सरकतदार ठरविण्याचे आहेत. जे दुर्दैवाने मुसलमान समाजात पण सर्रास आढळतात. पुढच्या महावाक्यांत अल्लाहतआला शिर्कचे खंडन करीत आहे.

२) म्हणजे तुम्ही सांगितलेल्या गोष्टींवर अंमलबजावणी करणार नाही. एक दुसरा भावार्थ याचा हा आहे की, जर तुम्ही त्यांच्याकडून मार्गदर्शनाची मागणी कराल, तर ते तुमची गोष्ट मान्य करणार नाही; न तुम्हाला कुठले उत्तरपण देणार.

३) म्हणजे जेव्हा ते जिवंत होते; किंबहुना आता तर तुम्ही स्वत: त्यांच्यापेक्षा जास्त परिपूर्ण आहात, आता ते पाहूशकत नाही, तुम्ही पाहता. ते ऐकू शकत नाही, तुम्ही ऐकतात. ते कोणाची गोष्ट समजू शकत नाही, तुम्ही समजतात. ते उत्तर देऊ शकत नाही, तुम्ही उत्तर देतात. याच्याने ठाऊक झाले की, मुशरिकीन ज्यांच्या मूर्ती बनवून, पुजा करीत होते; ते पण पूर्वी अल्लाहचे सेवक होते, म्हणजे मनुष्यच होते. जसे ह.नूह عليه السلام च्या लोकात, पाच मूर्त्यांच्या बाबतीत स.बुखारी मध्ये खुलासा आहे, की ते अल्लाहचे नेक बंदे होते. (पुण्यवान सेवक)

४) म्हणजे आता याच्यातून कुठलीही गोष्ट यांचे जवळ आढळून येत नाही. मृत्यू पावल्याबरोबर पहाणे, ऐकणे आणि समजणे व चालण्याची शक्ती संपून गेली. आता यांच्याकडे निर्देशित, लाकडाच्या किंवा दगडांच्या स्वत: घडविलेल्या मूर्त्या आहेत. किंवा घुमट, भिंती आणि स्थाने आहेत जे यांच्या कबरीवर बनविण्यात आले आहेत. आणि अशाप्रकारे आपल्या मृतांच्या विक्रीचा कारभार उर्जितावस्थेत आहे.

५) म्हणजे तुम्ही आपल्या दाव्यात खरे आहात की, हे तुमचे मददगार आहेत, तर त्यांना सांगा की, माझ्याविरुद्ध डावपेच लढवावेत.

إِنَّ وَلِـۧيَ اللّٰهُ الَّذِيْ نَزَّلَ الْكِتٰبَ ۖ وَهُوَ يَتَوَلَّى الصّٰلِحِيْنَ ﴿١٩٦﴾

खचित्‌च माझा मददगार अल्लाहतआला आहे; ज्याने हे पुस्तक अवतरीत केले; आणि तो सदाचरणी लोकांची मदद करतो (१९६)

وَالَّذِيْنَ تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِهٖ لَا يَسْتَطِيْعُوْنَ نَصْرَكُمْ وَلَآ اَنْفُسَهُمْ يَنْصُرُوْنَ ﴿١٩٧﴾

आणि तुम्ही ज्या लोकांची अल्लाहला सोडून उपासना करीत आहात, ते तुमची काही मदत करू शकणार नाही. आणि न ते आपली मदत करू शकतात[१] (१९७)

وَاِنْ تَدْعُوْهُمْ اِلَى الْهُدٰى لَا يَسْمَعُوْا ۖ وَتَرٰىهُمْ يَنْظُرُوْنَ اِلَيْكَ وَهُمْ لَا يُبْصِرُوْنَ ﴿١٩٨﴾

आणि त्यांना कोणी गोष्ट दाखवण्यासाठी पुकाराल, तर त्याला ऐकणार नाही[२]. आणि यांना आपण पहातात की, जणू ते आपणांस पहात आहेत; आणि ते काहींही पहात नाही (१९८)

خُذِ الْعَفْوَ وَاْمُرْ بِالْعُرْفِ وَاَعْرِضْ عَنِ الْجٰهِلِيْنَ ﴿١٩٩﴾

आपण क्षमेचा अंगिकार करा[३]. चांगल्या कामाची शिकवण द्या[४]. आणि गावंढळांपासून अलिप्त होऊन जा[५] (१९९)

وَاِمَّا يَنْزَغَنَّكَ مِنَ الشَّيْطٰنِ نَزْغٌ فَاسْتَعِذْ بِاللّٰهِ ۭ اِنَّهٗ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿٢٠٠﴾

आणि जर आपणास शैतानाकडून कोणी फुस (मनांत) ध्वनीत होईल, तर अल्लाहचा आश्रय मागत चला[६]. नि:संशय तो खूप ऐकणारा आणि खूप जाणणारा आहे (२००)

اِنَّ الَّذِيْنَ اتَّقَوْا اِذَا مَسَّهُمْ طٰۗىِٕفٌ مِّنَ الشَّيْطٰنِ تَذَكَّرُوْا فَاِذَا هُمْ مُّبْصِرُوْنَ ﴿٢٠١﴾

खचितच जे लोक अल्लाहचे भय बाळगणारे आहेत, जेव्हा त्यांना शैतानाकडून एखादा विचार स्पर्शून जातो, तर ते (अल्लाहच्या) स्मरणांत लागून जातात, तर अचानक त्यांचे डोळे उघडून जातात[७] (२०१)

وَاِخْوَانُهُمْ يَمُدُّوْنَهُمْ فِي الْغَيِّ ثُمَّ لَا يُقْصِرُوْنَ ﴿٢٠٢﴾

आणि जे आणि त्यांचे भाऊ त्यांना आडमार्गाकडे ओढून घेऊन जातात. मग ते त्यापासून परावृत्त होत नाही[८] (२०२)

وَاِذَا لَمْ تَاْتِهِمْ بِاٰيَةٍ قَالُوْا لَوْلَا اجْتَبَيْتَهَا ۭ قُلْ اِنَّمَآ اَتَّبِعُ مَا يُوْحٰٓى اِلَيَّ مِنْ رَّبِّيْ ۚ هٰذَا بَصَاۗىِٕرُ مِنْ رَّبِّكُمْ وَهُدًى وَّرَحْمَةٌ لِّقَوْمٍ يُّؤْمِنُوْنَ ﴿٢٠٣﴾

आणि जेव्हा आपण यांच्या समोर कोणी चमत्कार सादर करीत नाही, तर ते लोक म्हणतात की, आपण हा चमत्कार का घेऊन आला नाहीत[९]? आपण सांगून टाका की, मी त्याचे आज्ञापालन करतो, जे माझ्यावर माझ्या पालनकर्त्याकडून हुकूम (म्हणून) पाठविण्यात आले आहे. हे जणू पुष्कळसे पुरावे आहेत, तुमच्या पालनकर्त्याकडून, आणि मार्गदर्शन आणि दया आहे;त्या लोकांसाठी जे ईमान बाळगतात[१०] (२०३)

وَاِذَا قُرِئَ الْقُرْاٰنُ فَاسْتَمِعُوْا لَهٗ وَاَنْصِتُوْا لَعَلَّكُمْ تُرْحَمُوْنَ ﴿٢٠٤﴾

आणि जेव्हा कुरआन वाचले जाईल, तर ते लक्षपूर्वक ऐका आणि खामोश रहात जा; आशा आहे की, तुमच्यावर दया केली जाईल[११] (२०४)

وَاذْكُرْ رَّبَّكَ فِيْ نَفْسِكَ تَضَرُّعًا وَّخِيْفَةً وَّدُوْنَ الْجَهْرِ مِنَ الْقَوْلِ بِالْغُدُوِّ وَالْاٰصَالِ وَلَا تَكُنْ مِّنَ الْغٰفِلِيْنَ ﴿٢٠٥﴾

आणि हे मनुष्या! आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करीत जा; आपल्या मनांत, विनम्र होऊन आणि त्याच्या भयाबरोबर आणि मोठ्या आवाजाने (स्मरण) करण्याऐवजी खालच्या आवाजात, सकाळी आणि संध्याकाळी, आणि जे लोक बेपर्वाई करतात, त्यांच्यात तू गणती केला जाऊ नयेस (२०५)

الثلثة ٢٤ ع ١٨ ١٤ السجدة

२४ ४८ १४

اِنَّ الَّذِيْنَ عِنْدَ رَبِّكَ لَا يَسْتَكْبِرُوْنَ عَنْ عِبَادَتِهٖ وَيُسَبِّحُوْنَهٗ وَلَهٗ يَسْجُدُوْنَ ﴿٢٠٦﴾ السجدة ع

खचितच जे तुझ्या पालनकर्त्याच्या जवळ आहेत, ते त्याच्या उपासनेपासून अहंकार करीत नाही. आणि त्याची पवित्रता वर्णन करतात. आणि त्याला सजदा करतात (२०६)

१) जे आपली मदत स्वत: करण्यावर समर्थ नाहीत, ते बरे, दुसऱ्यांची मदत तरी काय करणार?

२) यात तोच भावार्थ आहे जो आ. १९३ चा आहे.

३) म्हणजे धर्मपंडीतांनी याचा अर्थ काढला आहे, ''जी आवश्यकतेपेक्षा जास्त संपत्ती असेल ती घेऊन घ्या.'' आणि हा जकात फर्ज होण्यापूर्वीचा हुकूम आहे. (फत्हुल बारी जिल्द - ८ पृ.३०५) परंतु दुसऱ्या भाष्यकारांनी याच्याने सद्‌चारित्र्य म्हणजे 'विसरा आणि क्षमा करा'' अभिप्रेत धरले आहे. आणि इमाम इब्ने जरीर व इमाम बुखारी वगैरेंनी, यालाच प्राधान्य दिले आहे. म्हणून इमाम बुखारीने याच्या भाष्यात, ह.उमर ﷺ ची एक गोष्ट नमुद केली आहे. की, उयैना बिन हिस्न, ह.उमर ﷺ च्या सेवेत हजर झाले; आणि येऊन त्यांच्यावर टिका करू लागले की, आपण आम्हांस

पुरेपुर देत नाही तसेच आमच्या दरम्यान न्याय धोरण स्वीकारत नाही. ज्यावर ह.उमर ﷺ फारच क्रोधीत झाले. ही परिस्थिती पाहून ह.उमर ﷺ चे सल्लागार हुर बिन कैस ने (जे उयैनाचे पुतणे होते) ह.उमर ﷺ ला म्हटले, अल्लाहतआलाने आपल्या नबी ﷺ ला हुकूम दिला होता. ''क्षमेला अंगिकारा, आणि चांगली कामे करण्याचा हुकूम द्या. आणि गावंढळ लोकांपासून अलिप्त रहा.'' 'आणि हे पण गावंढळांतूनच आहेत.' ''ज्यावर ह.उमर ﷺ नी माफ करून टाकले. आणि ह. उमर ﷺ अल्लाहच्या पुस्तकाचा हुकूम ऐकून ताबडतोब मान खाली घालणारे होते.'' (स.बुखारी तफसीर सू.आअ्राफ) याचे समर्थन या हदीसींनी पण होते ज्यांत जुलुमाच्या मुकाबल्यात माफ करून देण्याला, नाते संबंध तोडण्याच्या मुकाबल्यात नाते संबंध जोडण्याला, वाईटाचे निर्सन चांगल्या ने करण्याची शिकवण (प्रोत्साहन) देण्यात आले आहे.

४) उर्फ ने अभिप्रेत मारूफ म्हणजे चांगली कामे आहेत.

५) म्हणजे जेव्हा आपण चांगली कामे करण्याचा हुकूम देण्यात सर्व प्रकारचे प्रयत्न करून चुकले, आणि तरी सुद्धा ते मानत नाही; तर त्यांच्यापासून अलिप्त होऊन जा. आणि त्यांच्या भांडणाला आणि मूर्खपणाला उत्तर दऊ नका.

६) आणि अशा प्रसंगी आपणांस शैतान जर भडकविण्याचा प्रयत्न करील, तर आपण अल्लाहतआलाचा आश्रय मागीत जा.

७) यांत ईशभय बाळगणाऱ्यांच्या बाबतीत सांगण्यात आले आहे की, ते शैतानापासून सावध राहतात. 'ताईफ' किंवा 'तइफ' काल्पनिक चित्रे रंगवणाऱ्या शक्तीला म्हणतात, जी मनात येते किंवा स्वप्नात दिसते. येथे त्याला शैतानी फुसच्या अर्थांत वापरण्यात आले आहे. कारण की, शैतानाची फुसपण, काल्पनिक चित्रे रंगविण्यासारखीच आहे. (फत्हुल कदीर)

८) म्हणजे शैतान काफिरांना मार्गभ्रष्टतेकडे ओढून घेऊन जातात. मग तो काफिर किंवा शैतान त्यांना ओढून घेऊन जाण्यात कुचराई, कमी करीत नाही. म्हणून ला 'युकसिरून' चा 'फाईल' काफिरपण बनूंशकतात; आणि 'इखवानुल कुफ्फार' शैतानसुद्धा.

९) अभिप्रेत असा चमत्कार आहे, जो त्यांच्या सांगण्यावर त्यांच्या इच्छेनुसार जाहीर करून दाखवला जावा. जशा यांच्या काही मागण्या सू.बनी इस्राईल आ.९० ते ९३ मध्ये वर्णन करण्यात आल्या आहेत.

१०) 'लवला इजतबैय तहा' चा अर्थ आहे, तू स्वत:च का बनवून आणीत नाहीस? याच्या उत्तरांत सांगण्यात आले की, आपण सांगून टाका, चमत्कार सादर करणे, माझ्या अधिकारांत नाही. मी तर फक्त अल्लाहच्या वह्यचे अनुपालन करणारा आहे. हां, तथापि हे कुरआन जे माझ्याजवळ आले आहे; हे स्वत:च एक फार मोठा चमत्कार आहे. याच्यात तुमच्या पालनकर्त्याकडून पुरावे आणि निशाण्या व मार्गदर्शन आणि दया आहे; या अटीवर की कोणी ईमान आणणारा असावा.

११) हे त्या काफिरांना सांगण्यात येत आहे, जे कुरआनाचे पठण करताना गोंधळ करीत असत; आणि आपल्या साथीदारांना म्हणत, ''हे कुरआन ऐकू नका, आणि गोंधळ गडबड करा.'' (सू. हा मीम सजदा – २६) यांना सांगण्यात आले की, याच्या ऐवजी जर तुम्ही लक्षपूर्वक ऐकाल आणि गुपचुप बसाल, तर कदाचित अल्लाहतआला तुम्हाला हिदायत देऊन टाकेल. आणि अशाप्रकारे तुम्ही अल्लाहच्या दयेला पात्र बनून जाल.

काही धर्मपंडीत याला सर्वांसाठी गृहीत धरतात; म्हणजे जेव्हापण कुरआन वाचले जाईल, मग ते नमाजीत असो अथवा नमाजीशिवाय सर्वांना शांत चित्ताने कुरआन ऐकण्याचा हुकूम आहे. आणि मग या सर्व साधारण गोष्टी पासून आधार घेत, मोठ्याने पढल्या जाणाऱ्या नमाजीमध्ये, इमामाच्या मागे नमाज पढणाऱ्यांने, सू. फातेहा पढण्यास सुध्दा या कुरआनी हुकूमाच्या विरूद्ध ठरवितात. वास्तविक मोठ्याने पढल्या जाणाऱ्या नमाजीमध्ये इमामच्या मागे सू.फातेहा पढण्याची ताकीद नबी ﷺ कडून सही हदीसींनी सिद्ध आहे. म्हणून प्रथम तर या महावाक्याला फक्त काफिरांशी संबंधीतच समजणे बरोबर आहे; जसे याचे मक्केत अवतीर्ण होण्याने सुद्धा, याचे समर्थन होते. परंतु जर याला सर्वांसाठी समजण्यांत येईल, तरी सुद्धा या सर्वसाधारणपणाला, नबी ﷺ नी, इमामामागे नमाज पढणाऱ्यांना वगळून टाकले आणि अशाप्रकारे कुरआनाच्या या सर्वसाधारण होण्याला सुद्धा. मोठ्याने पढल्या जाणाऱ्या नमाजीमध्ये ईमामच्या मागे नमाज पढणाऱ्यांना सू.फातेहा पढणे आवश्यक होईल. कारण की कुरआनाच्या या सर्व साधारण होण्याचे हे वैशिष्टये सहीह आणि मजबूत हदीसींनी सिद्ध आहे. म्हणून ज्याप्रमाणे आणखी कांही कुरआनाच्या सर्व साधारणचे वगळणे, हदीसींच्या आधारांवर मान्य केले जाते. उदा. आयात 'अज्जानियतो वज्जानी फजलिदु' (सू. नूर–२) च्या सर्वसाधारणपणातून विवाहीताला वगळणे, किंवा त्याला वगळणे, ज्याने एक चतुर्थांश दिनारपेक्षा कमी किंमतीची चोरी केली असेल, किंवा चोरी केलेली वस्तू, सुरक्षित जागी ठेवली नसेल, वगैरे. अशाचप्रकारे, ''फसतमिउ लहु व अनसितु'' च्या सर्वसाधारण हुकूमांतून मुक्तदी वगळले जातील. आणि त्यांच्यासाठी मोठ्याने पढल्या जाणाऱ्या नमाजीमध्ये सुद्धा, सू.फातेहा पढणे आवश्यक होईल, कारण की नबी ﷺ नी याची ताकीद केली आहे. (जसे की,सू.फातेहाच्या भाष्यांत ह्या हदीसी वर्णन करण्यात आल्या आहेत)

महावाक्ये ७५ — (८) सू. अल- अन्फाल — रुकूअ १०

(٨) سُوْرَةُ الْاَنْفَالِ مَدَنِيَّةٌ (٨٨) — اٰيَاتُهَا ٧٥ — رُكُوْعَاتُهَا ١٠

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الْاَنْفَالِ ؕ قُلِ الْاَنْفَالُ لِلّٰهِ وَ الرَّسُوْلِ ۚ فَاتَّقُوا اللّٰهَ وَ اَصْلِحُوْا ذَاتَ بَيْنِكُمْ ۪ وَ اَطِيْعُوا اللّٰهَ وَ رَسُوْلَهٗۤ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ①

हे लोक आपणास मालेगनीमत (हाती लागलेल्या) माला विषयी हुकूम विचारतात[१]; आपण सांगून टाका की (युद्धात) हाती लागलेला हा माल अल्लाहचा आहे[२]; आणि पैगंबराचा आहे. म्हणून तुम्ही अल्लाहला भ्या; आणि आपल्या व्यवहारांत सुधारणा करा; आणि अल्लाहतआला आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करा; जर तुम्ही ईमानवाले आहात[३] ①

اِنَّمَا الْمُؤْمِنُوْنَ الَّذِيْنَ اِذَا ذُكِرَ اللّٰهُ وَجِلَتْ قُلُوْبُهُمْ وَ اِذَا تُلِيَتْ عَلَيْهِمْ اٰيٰتُهٗ زَادَتْهُمْ اِيْمَانًا وَّ عَلٰى رَبِّهِمْ يَتَوَكَّلُوْنَ ۚۖ ②

खरे ईमानवाले तर असे असतात की, जेव्हा अल्लाहतआलाचे नाव घेतले जाते तर त्यांची अंत:करणे भयभीत होऊन जातात. आणि जेव्हा अल्लाहची महावाक्ये त्यांना वाचून ऐकविली जातात; तर ती महावाक्ये त्यांच्या ईमानाला अधिक करून देतात;आणि ते लोक आपल्या पालनकर्त्यावर भरोसा करतात[४] ②

الَّذِيْنَ يُقِيْمُوْنَ الصَّلٰوةَ وَ مِمَّا رَزَقْنٰهُمْ يُنْفِقُوْنَ ؕ ③

जे आपल्या नमाजीची काळजी घेतात; आणि आम्ही त्यांना जे काही दिले आहे, ते त्यांतून खर्च करतात ③

اُولٰٓئِكَ هُمُ الْمُؤْمِنُوْنَ حَقًّا ؕ لَهُمْ دَرَجٰتٌ عِنْدَ رَبِّهِمْ وَ مَغْفِرَةٌ وَّ رِزْقٌ كَرِيْمٌ ۚ ④

खऱ्या ईमानवाले हेच लोक आहेत. यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याजवळ मोठे दर्जे आहेत; आणि (पापांची) क्षमा आणि इज्जत (आबरू) ची रोजी आहे ④

كَمَاۤ اَخْرَجَكَ رَبُّكَ مِنْۢ بَيْتِكَ بِالْحَقِّ ۪ وَ اِنَّ فَرِيْقًا مِّنَ الْمُؤْمِنِيْنَ لَكٰرِهُوْنَ ۙ ⑤

जसे की, आपल्या पालनकर्त्याने तुमच्या घरांतून युक्तीने तुम्हांस रवाना[५] केले; आणि मुसलमानांचा एक समूह याच्याने नाखुषच होता[६] ⑤

يُجَادِلُوْنَكَ فِي الْحَقِّ بَعْدَ مَا تَبَيَّنَ كَاَنَّمَا يُسَاقُوْنَ اِلَى الْمَوْتِ وَ هُمْ يَنْظُرُوْنَ ؕ ⑥

ते या युक्तीमध्ये याच्यानंतर की (सत्य) जाहीर होऊन गेले होते[७]; आपल्याशी अशा प्रकारे झगडत होते की, जणू कोणी त्यांना मृत्यूकडे हांकून नेत आहे; आणि ते पहात आहेत[८] ⑥

१) 'अन्फाल' 'नफ्ल' चे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ अधिकतर चा आहे. हे त्या धन आणि संपत्तीला म्हटले जाते, जे काफिरांबरोबरच्या युद्धात, हाती लागते, ज्याला गनीमत पण म्हटले जाते त्याला नफ्ल (अधिकतर) यासाठी म्हटले जाते की, हे त्या गोष्टीतून एक आहे, जे मागच्या उम्मतीवर निषिद्ध होते. ही जणू उम्मते मुहम्मदिया ﷺ वर एक अधिक गोष्ट हलाल (विहीत) करण्यांत आली आहे; किंवा यासाठी की, जिहादच्या प्रतिफळाने (जो परलोकांत मिळेल) एक अधिक वस्तूआहे, जी कधी कधी या जगांतच मिळून जाते.

२) म्हणजे याचा निर्णय करण्याचा एक अधिकार आहे. अल्लाहचा पैगंबर अल्लाहच्या हुकूमाने याची वाटणी करील. असे नाही की, तुम्ही अपासांत जसे इच्छाल, त्याला वाटून घ्याल.

३) याचा अर्थ हा झाला की, चर्चित तिन्ही गोष्टींवर अंमलबजावणी केल्याशिवाय ईमान परिपूर्ण होत नाही. याच्याने ईशभय आपसात, सुधारणा करणे, आणि अल्लाह आणि रसूलच्या आज्ञापालनाचे महत्त्व स्पष्ट होते. विशेष करून 'माले गनीमत' च्या वाटणीमध्ये, या तिन्ही गोष्टींवर अंमल करणे फार आवश्यक आहे; कारण की, संपत्तीच्या वाटणीत आपसांतील फिसादचा फारच तिव्र अंदेशा असतो, याच्या उपायात आपसात सुधारणा करण्यावर जोर दिला. हेराफेरी आणि लबाडीची पण शक्यता असते, म्हणून ईशभयाचा हुकूम दिला. यावर सुध्दा काही कोताई होऊन जाईल तर त्याचे उपाय, अल्लाह आणि रसूलच्या आज्ञापालनात आहे.

४) या महावाक्यांत ईमानवाल्यांची चार वैशिष्टये वर्णन करण्यात आली आहेत

१) ते अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करतात. २) अल्लाहचे नाव ऐकून, अल्लाहची शान

आणि महत्तेने त्यांची अंत:करणे थरथर कापू लागतात ३) कुरआनाच्या वाचनाने त्यांच्या ईमानात वाढ होते. (ज्याने ठाऊक झाले की ईमानमध्ये सुद्धा कमी जास्त होते, जसा की मोहद्दसीन चा मसलक आहे.) ४) आणि ते आपल्या पालनकर्त्यावर भरोसा करतात. भरोशाचा अर्थ आहे की, उघड प्रयत्न केल्यानंतर, अल्लाहच्या जातवर भरोसा करतात. म्हणजे साधनांपासून तोंड फिरवणे आणि पळ काढत नाही; कारण की त्यांना अंगिकारण्याचा हुकूम अल्लाहतआलानेच दिला आहे. परंतु उघड साधनांनाच सर्व काही समजत नाही, किंबहुना त्यांचा भरोसा असतो की मूळ कार्य साधणारी अल्लाहची मर्जीच असते. म्हणून जोपर्यंत अल्लाहची मर्जी होणार नाही, तोपर्यंत ही उघड साधने, काहीही करू शकणार नाहीत. आणि या विश्वास आणि भरोशाच्या आधारावर मग ते अल्लाहची मदत आणि सहाय्य मिळविण्याकरीता एक क्षण पण बेपर्वा होत नाही. पुढे त्यांच्या आणखी वैशिष्ट्यांची चर्चा आहे. आणि ही वैशिष्टये असलेल्या करीता अल्लाहकडून खरे ईमानवाले होण्याचे सर्टिफिकेट आणि क्षमा व अल्लाहची दया, आणि 'इज्जत' च्या रोजीची खुषखबर आहे. (अल्लाहतआला आम्हालापण त्यांच्यातून करून देवो. (आमीन)

*बद्रच्या युद्धाची पार्श्वभूमी :–* बद्रची लढाई, जी २ हिजरीमध्ये झाली, काफिरांबरोबर मुसलमानांची पहिली लढाई होती. या शिवाय ती कुठल्याही नियोजन आणि तयारीशिवाय अचानक झाली. म्हणून शस्त्र आणि साहित्याच्या अभावामुळे, काही मुसलमान बौद्धिकरित्या याला तयारपण नव्हते. थोडक्यात याची पार्श्वभूमी अशी आहे की, ह.अबु सुफयान ﵁ च्या (जे आतापर्यंत मुसलमान झाले नव्हते) आधीपत्त्याखाली, एक व्यापारी काफला सीरियाहून मक्केला जात होता. कारण की, मुसलमानांचा पुष्पकळसा माल व साधन संपत्ती हिजरत मुळे, मक्केत राहून गेला होता, किंवा काफिरांनी हिसकावून घेतला होता. तसेच काफिरांच्या सामर्थ्याला व ऐटीला तोडणे काळाजी गरज होती. या सर्व गोष्टींना डोळ्यासमोर ठेऊन, रसूलुल्लाह ﷺ नी, त्या व्यापारी काफल्यावर हल्ला करण्याचा कार्यक्रम बनवला; आणि मुसलमान या इराद्याने मदिनेहून निघाले. अबु सुफयानला पण या गोष्टीची सूचना मिळून गेली; म्हणून त्यांनी, प्रथम तर आपला मार्ग बदलून घेतला, नंतर मक्केला सूचना पाठवून दिली, जिच्या आधारावर अबुजहल, सैन्य घेऊन आपल्या काफल्याच्या संरक्षणार्थ बद्रकडे निघाला. नबी ﷺ ला या परिस्थितीचे ज्ञान झाले, तर सहाबा कराम ﵃ समोर वस्तू स्थिती ठेवून दिली. आणि अल्लाहचा वायदा पण सांगितला कीं या दोन (व्यापारी काफला आणि सैन्य) मधुन एक वस्तू तुम्हाला जरूर प्राप्त होईल. तथापि तरीसुद्धा लढाईला काही सहाबांनी संदेह दर्शविला. आणि व्यापारी काफल्यावर पाठलाग करण्याचा सल्ला दिला. जेव्हा दुसऱ्या सर्व सहाबांनी ﵃ रसूलुल्लाह ﷺ च्या बरोबर लढण्याला भरपूर पाठिंब्याचा विश्वास दिला. या पार्श्वभूमीवर हे महावाक्ये अवतरीत झालीत.

५) म्हणजे ज्याप्रमाणे गनीमतच्या संपत्तीच्या वाटणीचे प्रकरण, मुसलमानांमध्ये, मतभेदाला कारणीभूत बनले होते; मग त्याला अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या हवाली करून देण्यात आले, तर त्यांच्यात मुसलमानांची भलाई होती. अशाचप्रकारे आपले मदीनेतून निघणे, आणि मग पुढे जाऊन, व्यापारी काफल्याच्या ऐवजी कुरैशच्या सैन्याशी सामना होऊन जाणे, जरी काही अनुयायांना पसंत नव्हते, परंतु याच्यांत सुद्धा सरशेवटी मुसलमानांचाच फायदा झाला.

६) ही नाखुषी कुरैशी सैन्याशी लढण्याच्या संबंधातपण होती; ज्याचे प्रकटीकरण काही एक व्यक्तीकडून झाले; आणि याचे कारणसुद्धा फक्त शस्त्रे व साहित्याचा अभाव होता. याचा संबंध मदीनेहून निघण्याशी नाही.

७) म्हणजे ही गोष्ट स्पष्ट होऊन गेली होती की, काफला तर पुढे निघून गेला आहे. आणि आता कुरैशी सैन्यच पुढे आहे, ज्यांच्याशी युद्ध अटळ आहे.

८) हे शस्त्र-साहित्याच्या अभावाच्या स्थितीत लढण्याचे कारणामुळे, काही मुसलमानांची जी अवस्था होती, त्याचे जाहीर करणे आहे.

وَإِذْ يَعِدُكُمُ اللّٰهُ إِحْدَى الطَّآئِفَتَيْنِ أَنَّهَا لَكُمْ وَتَوَدُّونَ أَنَّ غَيْرَ ذَاتِ الشَّوْكَةِ تَكُونُ لَكُمْ وَيُرِيدُ اللّٰهُ أَن يُحِقَّ الْحَقَّ بِكَلِمٰتِهِ وَيَقْطَعَ دَابِرَ الْكٰفِرِينَ ﴿٧﴾

आणि (तुम्ही लोक त्यावेळेची आठवण करा;) जेव्हा की अल्लाह तुमच्याशी त्या दोन समूहांतून एकाचा वायदा करीत होता की, तो तुमच्या हाती येऊन जाईन[१]; आणि तुम्ही अशी आशा बाळगत होता की, शस्त्र विरहीत समूह तुमच्या हाती येऊन जावा[२]; आणि अल्लाहतआलाला हे मंजुर होते की, आपल्या आदेशाने, सत्त्याचे सत्य होणे, सिद्ध करून द्यावे. आणि त्या काफिरांचा मुळच्छेद करून टाकावा (७)

لِيُحِقَّ الْحَقَّ وَيُبْطِلَ الْبٰطِلَ وَلَوْ كَرِهَ الْمُجْرِمُونَ ﴿٨﴾

कारण की, सत्त्याचे सत्य होणे आणि असत्त्याचे असत्य होणे, सिद्ध करून घ्यावे; जरी अपराधी लोक याला नापसंतच करोत[३] (८)

إِذْ تَسْتَغِيثُونَ رَبَّكُمْ فَاسْتَجَابَ لَكُمْ أَنِّي مُمِدُّكُم بِأَلْفٍ مِّنَ الْمَلٰٓئِكَةِ مُرْدِفِينَ ﴿٩﴾

(त्यावेळेची आठवण करा), जेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याशी फिर्याद करीत होता; मग अल्लाहतआलाने तुमचे ऐकून घेतले; की मी तुमची एक हजार देवदूतांनी मदत करीन, जे लागोपाठ चालले येतील[४] (९)

وَمَا جَعَلَهُ اللّٰهُ إِلَّا بُشْرٰى وَلِتَطْمَئِنَّ بِهِ قُلُوبُكُمْ وَمَا النَّصْرُ إِلَّا مِنْ عِندِ اللّٰهِ إِنَّ اللّٰهَ عَزِيزٌ حَكِيمٌ ﴿١٠﴾ ع ١٥

आणि अल्लाहतआलाने ही मदत, केवळ यासाठी केली की, (तुम्ही) खूष होऊन जावे आणि तुमची अंत:करणे समाधान पावावीत;आणि मदत फक्त अल्लाहकडून आहे[५]. जो की, परमसमर्थ व सत्य संकल्प आहे (१०)

إِذْ يُغَشِّيكُمُ النُّعَاسَ أَمَنَةً مِّنْهُ وَيُنَزِّلُ عَلَيْكُم مِّنَ السَّمَآءِ مَآءً لِّيُطَهِّرَكُم بِهِ وَيُذْهِبَ عَنكُمْ رِجْزَ الشَّيْطٰنِ وَلِيَرْبِطَ عَلٰى قُلُوبِكُمْ وَيُثَبِّتَ بِهِ الْأَقْدَامَ ﴿١١﴾

त्यावेळेची आठवण करा, जेव्हा अल्लाह तुमच्यावर झोपेची गुंगी पसरवत होता, आपल्याकडून अभयासाठी[६], आणि तुमच्यावर आकाशांतून पाणी वर्षावित होता की, या पाण्याने तुम्हाला पाकसाफ करून टाकावे; आणि तुमच्या पासून शैतानी फुसला दूर करून टाकावे[७]; आणि तुमच्या मनाला दृढ संकल्प करून टाकावे; आणि तुमच्या पायांना जमवून टाकावे[८] (११)

إِذْ يُوحِي رَبُّكَ إِلَى الْمَلٰٓئِكَةِ أَنِّي مَعَكُمْ فَثَبِّتُوا الَّذِينَ ءَامَنُوا سَأُلْقِي فِي قُلُوبِ الَّذِينَ كَفَرُوا الرُّعْبَ فَاضْرِبُوا فَوْقَ الْأَعْنَاقِ وَاضْرِبُوا مِنْهُمْ كُلَّ بَنَانٍ ﴿١٢﴾

त्या वेळेला आठवा, जेव्हा तुमचा पालनकर्ता, देवदूतांना हुकूम देत होता की, मी तुमचा साथीदार आहे; तर तुम्ही ईमानवाल्यांची हिंमत वाढवा; मी आता काफिरांच्या मनांत तुमची दहशत बसवून देत आहे[९]. तर तुम्ही त्यांच्या मानांवर मारा; आणि त्यांच्या (बोटांच्या) पेरा पेरांवर मारा[१०] (१२)

ذٰلِكَ بِأَنَّهُمْ شَآقُّوا اللّٰهَ وَرَسُولَهُ وَمَن يُشَاقِقِ اللّٰهَ وَرَسُولَهُ فَإِنَّ اللّٰهَ شَدِيدُ الْعِقَابِ ﴿١٣﴾

ही त्या गोष्टीची शिक्षा आहे, की त्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला; आणि जो अल्लाहचा आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतो, त्याला अल्लाहतआला कडक शिक्षा देतो (१३)

ذٰلِكُمْ فَذُوقُوهُ وَأَنَّ لِلْكٰفِرِينَ عَذَابَ النَّارِ ﴿١٤﴾

तर ही शिक्षेची (गोडी) चाखा; आणि लक्षांत ठेवा की, काफिरांकरता नरकाग्नीची शिक्षा निश्चितच आहे (१४)

يٰٓأَيُّهَا الَّذِينَ ءَامَنُوٓا إِذَا لَقِيتُمُ الَّذِينَ كَفَرُوا زَحْفًا فَلَا تُوَلُّوهُمُ الْأَدْبَارَ ﴿١٥﴾

हे ईमानवाल्यांनो! जेव्हा तुमची काफिरांशी समोरासमोर गाठ पडून जाईल, तेव्हा त्यांच्यापासून पाठ फिरवू नका[११] (१५)

وَمَن يُوَلِّهِمْ يَوْمَئِذٍ دُبُرَهُ إِلَّا مُتَحَرِّفًا لِّقِتَالٍ أَوْ مُتَحَيِّزًا إِلٰى فِئَةٍ فَقَدْ بَآءَ بِغَضَبٍ مِّنَ اللّٰهِ وَمَأْوٰىهُ جَهَنَّمُ وَبِئْسَ الْمَصِيرُ ﴿١٦﴾

आणि जो मनुष्य अशावेळी पाठ फिरवील, परंतु तो लढाईसाठी वळसा घेईल, किंवा जो आपल्या समूहाकडे आश्रय घेण्यांस येत असेल, तो अपवाद[१२] आहे. बाकी जो असे करील, तो अल्लाहच्या कोपांत येऊन जाईल; आणि त्याचे ठिकाण नरकाग्नी असेल; आणि ती फारच वाईट जागा आहे[१३] (१६)

१) म्हणजे एक तर व्यापारी काफला तुम्हांस भेटून जाईल, ज्यामुळे तुम्हांस युद्धा शिवाय, भरपूर संपत्ती व साहित्य मिळून जाईल; नाही तर दुसऱ्या परिस्थितीत, कुरैशी सैन्याशी तुमचा सामना होईल, आणि तुम्हाला वर्चस्व मिळेल आणि गनीमतची संपत्ती मिळेल.

२) म्हणजे व्यापारी काफला; कारण की युद्धाशिवाय संपत्ती हाती येऊन जाईल.

३) परंतु अल्लाह याच्या उलट, हे इच्छित होता, की, कुरैशी सैन्याशी तुमची लढाई व्हावी. कारण की कुफ्रचे सामर्थ्य आणि ऐट, तुटून जावी. जरी ही गोष्ट अपराध्यांना नापसंत असेल.
४) या युद्धात मुसलमानांची संख्या ३१३ होती. जेव्हा की कफिर याच्या तिप्पट (म्हणजे हजारच्या जवळपास) होते; मग मुसलमान नि:संशय आणि साहित्याशिवाय होते; जेव्हा की, काफिरांजवळ भरपूर शस्त्रात्रे होती. अशा परिस्थितीत, मुसलमानांचे आश्रयस्थान फक्त अल्लाहची जात होती; ज्याच्याजवळ ते व्याकुळतेने मदतीची याचना करीत होते; खुद्द नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, वेगळ्या एका तंबुत फारच नम्रतेने आणि व्याकुळतेने दुआ करण्यांत मग्न होते. (स.बुखारी किताबुल मगाजी) या पद्धतीने, अल्लाहतआलाने (त्यांच्या) दुआ मान्य केल्या; आणि हजार देवदूत, एकामागे एक क्रमश: मुसलमानांच्या मदतीसाठी येऊन पोहचले.
५) म्हणजे देवदूतांचे अवतरण तर फक्त तुम्हास खुषखबरी आणि तुमच्या मनाच्या समाधानासाठी होते. नाही तर खरी मदत तर अल्लाहतआलाकडून होती; जो देवदूतांशिवाय पण तुमची मदत करू शकत होता. तथापि याच्याने, हे समजणेपण बरोबर नाही की, देवदूतांनी प्रत्यक्ष युद्धात भाग घेतला नाही. हदिर्शीनी माहित पडते की, युद्धात देवदूतांनी प्रत्यक्ष भाग घेतला; आणि कित्येक काफिरांना त्यांनी तलवारीने कापून काढले. (पहा. स.बुखारी व स.मुस्लीम किताबुल मगाजी व फजाइले सहाबा.)
६) बद्रच्या युद्धात अल्लाहतआलाने मुसलमानांवर झोपेची गुंगी पसरवून दिली. ज्यामुळे त्यांच्या मनावरचे ओझे हलके होऊन गेले. आणि समाधान आणि संतोषाची एक विशिष्ट अवस्था त्यांच्यावर पसरून गेली.
७) तिसरी कृपा ही केली की, पाऊस पाडून दिला, ज्याच्याने एक तर रेताड जमिनीत चालणे फिरणे सोपे होऊन गेले. दुसरे वजु आणि पाक साफ होणे सोपे होऊन गेले. तिसरे याच्याने शैतानी फुसचे निर्सन करून देण्यात आले; जी तो ईमानवाल्यांच्या मनांत टाकत होता; की तुम्ही अल्लाहचे पुण्यवान सेवक असून सुद्धा पाण्यापासून दूर आहात. दुसरे विर्यपतनाच्या अवस्थेत तुम्ही लढाल, तर कशी अल्लाहकडून मदत आणि विजय तुम्हांस प्राप्त होईल ? तिसरे तुम्ही तान्हेले आहांत, जेव्हा की तुमचे शत्रु तृप्त आहेत. वगैरे वगैरे.
८) हे चवथे बक्षीस आहे, जे मनांना आणि पायांना मजबूत करून दिले गेले.
९) हे अल्लाहतआलाने देवदूतांमार्फत आणि खास आपल्याकडून ज्या ज्या प्रकारे मुसलमानांची मदत केली, त्याचे वर्णन आहे.
१०) 'बनान' हाता पायाची पेरे, म्हणजे त्यांच्या बोटांची टोके ही टोके. कापून टाकली जातील, तर उघड आहे की ते अपंग होऊन जातील. अशा प्रकारे ते हाताने तलवार चालविण्याला आणि पायाने पळण्याला ते योग्य राहणार नाही.
११) 'जहफन्' चा अर्थ आहे, एकमेकासमोर उभे ठाकणे. म्हणजे मुसलमान आणि काफिर जेव्हा एक दुसऱ्याच्या समोर रांगेत उभे राहिले, तर पाठ फिरवून पळून जाण्याची परवानगी नाही. एका हदिशीत आहे, 'सात नष्ट करणाऱ्या गोष्टींपासून वाचा.' त्या सात मधून एक 'व त्तवल्ली यौमज् जहफी' सामन्याच्या दिवशी, पाठ फिरवून देणे'' (स.बुखारी क्र.२७६६, स.मुस्लिम)
१२) मागील महावाक्यांत पाठ फिरविण्यापासून जे मना करण्यांत आले आहे, दोन प्रकार यांतून वगळण्यात आले आहे. तहर्रूफ चा अर्थ एका बाजूस वळणे; म्हणजे युद्धांत, युद्धनिती म्हणून किंवा शत्रुला फसगतीत टाकण्यासाठी लढता लढता एका बाजूस वळून जावे; शत्रुला असे वाटावे की, कदाचित हा पराभव झाला म्हणून पळ काढत आहे मग तो एकदम चाल बदलून शत्रुवर हल्ला करून देईन. हे पाठ फिरवणे नाही; परंतु हा युद्धातील एक डावपेच आहे; जो केव्हा केव्हा आवश्यक आणि फायदेकारक ठरतो. 'तहय्युज' चा अर्थ भेटणे आणि आश्रय घेणे आहे. कोणी योद्धा लढता लढता एकटा पडून जावा, तर तो लक्षात येणार नाही अशा प्रकारे युद्ध मैदानातून एकीकडे होऊन जावा की, त्याने आपल्या समूहाकडे आश्रय घ्यावा; आणि त्याच्या मदतीने दुसऱ्यांदा हल्ला करावा. हे दोन्ही प्रकार योग्य आहेत.
१३) म्हणजे वर उल्लेखित दोन्ही प्रकाराशिवाय कोणी मनुष्य युद्ध मैदानातून पाठ फिरवील, त्याच्यासाठी कडक चेतावणी आहे.

فَلَمْ تَقْتُلُوْهُمْ وَلٰكِنَّ اللّٰهَ قَتَلَهُمْ ۪ وَمَا رَمَيْتَ
اِذْ رَمَيْتَ وَلٰكِنَّ اللّٰهَ رَمٰى ۚ وَلِيُبْلِيَ الْمُؤْمِنِيْنَ
مِنْهُ بَلَآءً حَسَنًا ؕ اِنَّ اللّٰهَ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿١٧﴾

**तर तुम्ही त्यांना ठार केले नाही, परंतु अल्लाहने त्यांना ठार केले[१]. आणि आपण वाळू फेकली नाही, परन्तु अल्लाहतआला ने ती फेकली[२], आणि कारण की, मुसलमानास आपल्याकडून त्यांच्या मेहनतीचे खूप बक्षीस द्यावे[३]. नि:संशय अल्लाहतआला खूप ऐकणारा आणि खूप जाणणारा आहे ⑰**

ذٰلِكُمْ وَاَنَّ اللّٰهَ مُوْهِنُ كَيْدِ الْكٰفِرِيْنَ ﴿١٨﴾

**(एक गोष्ट तर) ही झाली, आणि (दुसरी गोष्ट ही आहे) की, अल्लाहतआलाला काफिरांच्या षढ्यंत्रांना (कारस्थानांना) ढिले करणे होते[४] ⑱**

اِنْ تَسْتَفْتِحُوْا فَقَدْ جَآءَكُمُ الْفَتْحُ ۚ وَاِنْ تَنْتَهُوْا
فَهُوَ خَيْرٌ لَّكُمْ ۚ وَاِنْ تَعُوْدُوْا نَعُدْ ۚ وَلَنْ تُغْنِيَ
عَنْكُمْ فِئَتُكُمْ شَيْئًا وَّلَوْ كَثُرَتْ ۙ وَاَنَّ
اللّٰهَ مَعَ الْمُؤْمِنِيْنَ ﴿١٩﴾ ع ٢ ٩ ١٦

**जर तुम्ही लोक निर्णय इच्छितात तर तो निर्णय तुमच्यासमोर (तुम्हाला) आढळून आला[५]; आणि जर परावृत्त व्हाल तर हे तुमच्यासाठी उत्तम आहे; आणि जर तुम्ही पुन्हा तेच काम केले, तर आम्ही सुद्धा पुन्हा तेच काम करूआणि तुमचा जथ्था तुमच्या काहीच कामा येणार नाही; मग तो कितीका मोठा असेना! आणि खरी गोष्ट ही आहे की, अल्लाहतआला ईमानवाल्यांबरोबर आहे ⑲** (२ ९ १६)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اَطِيْعُوا اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ وَلَا
تَوَلَّوْا عَنْهُ وَاَنْتُمْ تَسْمَعُوْنَ ﴿٢٠﴾

**हे ईमानवाल्यांनो! अल्लाहचे आणि त्याच्या पैगंबराचे म्हणणे माना; आणि त्याचे (म्हणणे मान्य करण्या) पासून तोंड फिरवू नका; आणि तुम्ही तर ऐकूनच आहांत ⑳**

وَلَا تَكُوْنُوْا كَالَّذِيْنَ قَالُوْا سَمِعْنَا وَهُمْ
لَا يَسْمَعُوْنَ ﴿٢١﴾

**आणि तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका; जे दावा तर करतात की, आम्ही ऐकून घेतले आणि पाहू जाता, ते ऐकत वैकत काहीच नाही[६] ㉑**

१) म्हणजे बद्रच्या युद्धाची सर्व वस्तुस्थिती तुमच्यासमोर ठेवून देण्यात आली आहे. आणि ज्या ज्या प्रकारे अल्लाहने, तुमची तेथे मदत केली, त्याच्या खुलाशानंतर तुम्ही हे न समजावे की, काफिरांना ठार करणे, ही तुमची कामगिरी आहे; नाही, परंतु हा अल्लाहच्या त्या मदतीचा परिणाम आहे, ज्याच्यामुळे तुम्हांस ही शक्ती प्राप्त झाली. म्हणून खरे पाहू जाता, त्यांना ठार करणारा अल्लाहतआला आहे.

२) बद्रच्या युद्धात नबी ﷺ नी वाळूची एक मूठ भरून, काफिरांकडे फेंकली होती. ज्यामुळे एक तर अल्लाहतआलाने काफिरांच्या तोंड आणि डोळ्यापर्यंत तिला पोहचवून दिले. आणि दुसरे तिच्यांत असा परिणाम करून दिला की, याच्याने त्यांचे डोळे दिपून गेले, आणि त्यांना काही सूचत नव्हते. हा चमत्कार पण, जो अल्लाहच्या मदतीने प्रकट झाला; मुसलमानांच्या यशांत, फार मदत करणारा सिद्ध झाला. अल्लाहतआला फर्मावित आहे की, हे पैगंबरा ! वाळू नि:संशय तुम्हीच फेंकली होती, परंतु त्याच्यांत गुणधर्म आम्ही निर्माण केला होता; जर आम्ही याच्यांत हा गुणधर्म निर्माण केला नसता, तर ही वाळू काय करूशकली असती? म्हणून हे पण, खरे म्हणजे आमचेच काम होते; न की तुमचे.

३) 'बलाउन' येथे देणगीच्या अर्थात आहे. म्हणजे अल्लाहचा हा पाठींबा आणि मदत अल्लाहचे ईनाम आहे, जे ईमानवाल्यांवर (विश्वासुवर) झाले.

४) दुसरा उद्देश्य याचा काफिरांच्या डावपेचाला कमजोर करणे, आणि त्यांच्या शक्तीला आणि अहंकाराला तोडणे, हा होता.

५) अबुजहल वगैरे, कुरैशांचे सरदार यांनी मक्केहून निघतांना, प्रार्थना केली होती की, ''हे अल्लाह ! आमच्यांतून जो तुझा जास्त आज्ञाभंजक, आणि नाते संबंधांना तोडणारा आहे, त्याला तू उद्या नष्ट करून टाक.'' आपल्या समजुतीप्रमाणे ते मुसलमानांना, नाते संबंधांना तोडणारे आणि आज्ञाभंजक समजत होते. म्हणून अशा प्रकारची प्रार्थना केली. आता जेव्हा अल्लाहतआलाने मुसलमानांना विजय मिळवून दिला, तर अल्लाहतआला या काफिरांना म्हणत आहे की, तुम्ही विजय म्हणजे, सत्य व असत्त्यात निर्णय करून देण्याचे इच्छुक होता, तर तो निर्णय तर समोर येऊन चुकला आहे; म्हणून आता तुम्ही 'कुफ्र' पासून परावृत्त होऊन जा; तर तुमच्यासाठी उत्तम आहे. आणि जर तुम्ही दुसऱ्यांदा मुसलमानांच्या मुकाबल्यात परत याल, तर आम्ही सुद्धा दुसऱ्यांदा त्यांची मदत करू आणि तुमचा समूह संख्या बाहुल्य असून सुद्धा तुमच्या काही कामा येणार नाही.

६) म्हणजे ऐकून घेतल्यावर सुद्धा, अमंलबजावणी न करणे, ही काफिरांची पद्धत आहे. तुम्ही अशा वागणुकीपासून (स्वत:ला) वाचवा. पुढील महावाक्यांत अशाच लोकांना बहिरे, मुके, समज नसलेले आणि वाईट प्राणी ठरविण्यात आले आहे. 'दवाब्ब' 'दाब्बतून' चे अनेकवचन आहे. जी पण पृथ्वीच्या पाठीवर चालणारी फिरणारी वस्तूआहे, ती 'दाब्बा' आहे. अभिप्रेत सृष्टी निर्मिती आहे. म्हणजे हे सर्व वाईट आहेत, जे सत्त्याच्या मामल्यांत बहिरे, मुके आणि बेअक्कल आहेत.

إِنَّ شَرَّ الدَّوَآبِّ عِندَ اللَّهِ الصُّمُّ الْبُكْمُ الَّذِينَ لَا يَعْقِلُونَ ﴿٢٢﴾

**नि:संशय अल्लाहतआलाजवळ वाईट प्राणी ते आहेत, जे बहिरे आणि मुके आहेत, जे जरापण समजत नाही[१] ㉒**

وَلَوْ عَلِمَ اللَّهُ فِيهِمْ خَيْرًا لَّأَسْمَعَهُمْ ۖ وَلَوْ أَسْمَعَهُمْ لَتَوَلَّوا وَّهُم مُّعْرِضُونَ ﴿٢٣﴾

**आणि जर अल्लाहतआला यांच्यात काही चांगुलपणा पाहता, तर त्यांना ऐकून घेण्याची सुबुद्धी देऊन दिली असती[२]. आणि जर यांना आता ऐकवून देईल, तर दुर्लक्ष करून[३] अवश्य तोंड फिरवून देतील ㉓**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا اسْتَجِيبُوا لِلَّهِ وَلِلرَّسُولِ إِذَا دَعَاكُمْ لِمَا يُحْيِيكُمْ ۖ وَاعْلَمُوا أَنَّ اللَّهَ يَحُولُ بَيْنَ الْمَرْءِ وَقَلْبِهِ وَأَنَّهُ إِلَيْهِ تُحْشَرُونَ ﴿٢٤﴾

**अहो ईमानवाल्यांनो! तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे म्हणणे मान्य करा; जेव्हा की, पैगंबर तुम्हास तुमच्या जीवनात चैतन्य आणणाऱ्या गोष्टींकडे बोलवित असेल[४]; आणि लक्षांत असू द्या की, अल्लाहतआला, मनुष्य आणि त्याच्या अंत:करणादर्म्यान, आड बनून जात असतो[५]. आणि नि:संशय तुम्ही सर्वांस अल्लाहजवळ जमा होणे आहे ㉔**

१) या गोष्टीला कुरआन करीममध्ये दुसऱ्या ठिकाणी अशाप्रकारे वर्णन करण्यात आले आहे.''यांची अंत:करणे आहेत, परंतु त्यांच्याने ते समजत नाहीत; त्यांचे डोळे आहेत ज्याच्याने ते पहात नाहीत, आणि त्यांचे कान आहेत ज्याच्याने ते ऐकत नाहीत, हे चतुष्पादासारखे आहेत; परंतु त्यांच्यापेक्षाही जास्त वाट चुकलेले, हे लोक अल्लाहकडून बेखबर आहेत.'' (सू. आअ्‌राफ -१७९)

२) म्हणजे यांच्या ऐकण्याला फायदेकारक बनवून, त्यांच्या समजबुजला योग्य बनवून दिले असते. ज्यामुळे ते सत्त्याला कबूल करून घेते, आणि त्याला अंगिकारून घेते; परंतु ज्याअर्थी त्यांच्यात भलाई, म्हणजे सत्त्याची इच्छाच नाही, म्हणून ते योग्य समझबुजपासून वंचित आहेत.

३) पहिल्या ऐकण्याने अभिप्रेत फायदेकारक ऐकणे आहे. या दुसऱ्या ऐकण्याने अभिप्रेत नुसते ऐकणे आहे. म्हणजे जर अल्लाहतआला त्यांना सत्य गोष्ट ऐकवून पण देईल, तरी ज्याअर्थी यांच्यांत सत्त्याची चाड नाही; म्हणून ते नेहमीप्रमाणे याच्या पासून पळच काढतील.

४) ''लिमा युहयीकुम'' अशा गोष्टींकडे ज्यामुळे तुम्हांस जीवन मिळेल. काहींनी याच्याने अभिप्रेत जिहाद घेतले आहे, की यात तुमच्या जीवनासाठी साहित्य व सामान आहे. काहींनी कुरआनाच्या 'भलाईचा हुकूम करणे आणि वाईटाला मना करणे' आणि धर्म-शास्त्राच्या आदेशांना अभिप्रेत धरले आहे; ज्यांत जिहादपण येऊन जाते. अर्थ हा आहे की, फक्त अल्लाह व त्याच्या पैगंबराचे म्हणणे मान्य करा. आणि त्यावर अंमलबजावणी करा. यातच तुमचे जीवन आहे.

५) म्हणजे मृत्यू देऊन; ज्याची गोडी प्रत्येक जीवाला चाखावयाची आहे. अर्थ हा आहे की, याच्यापूर्वी की, तुम्हास मृत्यू येऊन जावा; अल्लाह व पैगंबराचे म्हणणे मान्य करून घ्या. आणि त्यावर अमल करा. काहीनी म्हटले आहे की, अल्लाहतआला माणसाच्या अंत:करणाच्या ज्याप्रमाणे जवळ आहे; यांत त्याला उपमा म्हणून वर्णन करण्यांत आले आहे. आणि अर्थ हा आहे की, तो मनांत लपलेल्या गोष्टींना जाणतो, त्याच्यापासून कोणतीही गोष्ट गुप्त नाही. इमाम इब्ने जरीरने, याचा भावार्थ हा सांगितला आहे की, तो (अल्लाह) आपल्या सेवकांच्या मनांवर पूर्ण अधिकार बाळगतो. आणि जेव्हा इच्छितो तेव्हा, त्यांच्या आणि त्यांच्या अंत:करणाच्या दरम्यान आडपर्दा होऊन जातो; येथपर्यंत की मनुष्य त्याच्या मर्जीशिवाय कोण्या वस्तुला प्राप्त करू शकत नाही. काहींनी याला बद्रच्या युद्धाच्या संबंधित केले आहे; की मुसलमान शत्रुच्या संख्याबाहुल्यामुळे भयभीत होते; तर अल्लाहतआलाने मनांच्या दरम्यान आडपर्दा करून मुसलमानांच्या मनांत असलेल्या भयाला अभयाने बदलून दिले. इमाम शौकानी म्हणतात की, या आयतचे सर्वच भावार्थाचे अभिप्रेत असु शकतात. (फत्हुल कदीर) इमाम इब्ने जरीरच्या वर्णन केलेल्या त्या भावार्थाचे समर्थन त्या हदिर्शीने होते, ज्यात धर्मावर दृढ जमून राहण्याच्या दुआ करण्याची ताकीद केली गेली आहे. उदाहरणार्थ एका हदीस मध्ये, रसूलुल्लाह ﷺ नी सांगितले, ''आदमांच्या संततीची मने, एका मनासारखे रहमानच्या दोन बोटांच्या दरम्यान आहे, त्याला ज्याप्रमाणे इच्छितो, फिरवीत रहातो.'' मग आपण ﷺ नी ही दुआ म्हटली, ''अल्लाहुम्मा मुसर्रिफल कुलुबे सरीफ कुलुबना इला ताअतिक'' ''हे मनांच्या फिरवून देणाऱ्या! आमच्या मनांना आपल्या आज्ञापालनाकडे फिरवून दे.'' (स.मुस्लीम) काही रिवायतीमध्ये, ''सब्बित कल्बी अला दीनिका'' (तिर्मिझी) चे शब्द आहेत.

وَاتَّقُوْا فِتْنَةً لَّا تُصِيْبَنَّ الَّذِيْنَ ظَلَمُوْا مِنْكُمْ خَآصَّةً ۚ وَاعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ شَدِيْدُ الْعِقَابِ ﴿٢٥﴾

आणि तुम्ही अशा फितुरांपासून जपा, की जो खास याच लोकांवर लागू पडणार नाही, जो तुमच्यातून या अपराधाचे करणारे झाले असतील[१]. आणि जाणून असा अल्लाह फारच कडक शिक्षा देणारा आहे २५

وَاذْكُرُوْٓا اِذْ اَنْتُمْ قَلِيْلٌ مُّسْتَضْعَفُوْنَ فِي الْاَرْضِ تَخَافُوْنَ اَنْ يَّتَخَطَّفَكُمُ النَّاسُ فَاٰوٰىكُمْ وَاَيَّدَكُمْ بِنَصْرِهٖ وَرَزَقَكُمْ مِّنَ الطَّيِّبٰتِ لَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿٢٦﴾

आणि (त्या स्थितीची पण आठवण करा) जेव्हा तुम्ही भूमीवर थोडेसे होता, दुर्बल लेखले जात होता. या भितीत रहात होता की, तुम्हांस लोक बळेच धरून उचलून नेतील; तर अल्लाहने तुम्हास रहाण्यास जागा दिली आणि आपल्या मदतीने शक्ती दिली. आणि तुम्हास चांगल्या चांगल्या वस्तू दिल्यांत, की कदाचित् तुम्ही आभार मानावेत[२] २६

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَخُوْنُوا اللّٰهَ وَالرَّسُوْلَ وَتَخُوْنُوْٓا اَمٰنٰتِكُمْ وَاَنْتُمْ تَعْلَمُوْنَ ﴿٢٧﴾

अहो ईमानवाल्यांनो! तुम्ही अल्लाह आणि पैगंबराच्या हक्कात दगलबाजी करू नका. आणि आपल्या संरक्षणात असलेल्या वस्तूमध्ये दगलबाजी करू नका. आणि तुम्ही तर जाणत आहात[३] २७

وَاعْلَمُوْٓا اَنَّمَآ اَمْوَالُكُمْ وَاَوْلَادُكُمْ فِتْنَةٌ ۙ وَّاَنَّ اللّٰهَ عِنْدَهٗٓ اَجْرٌ عَظِيْمٌ ﴿٢٨﴾

आणि (या गोष्टीला पण लक्षांत ठेवा की), तुमचे धन आणि तुमची संतती, एक परीक्षेची वस्तूआहे[४]; आणि या गोष्टीला पण लक्षांत ठेवा की, अल्लाहतआला जवळ मोठे भारी प्रतिफल आहे २८

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِنْ تَتَّقُوا اللّٰهَ يَجْعَلْ لَّكُمْ فُرْقَانًا وَّيُكَفِّرْ عَنْكُمْ سَيِّاٰتِكُمْ وَيَغْفِرْ لَكُمْ ۭ وَاللّٰهُ ذُو الْفَضْلِ الْعَظِيْمِ ﴿٢٩﴾

अहो ईमानवाल्यांनो! जर तुम्ही अल्लाहला भीत रहाल; तर अल्लाहतआला तुमच्यासाठी एक तारतम्य पैदा करील; आणि तुमची पापें तुमच्यावरून दूर करून टाकील; आणि तुम्हास क्षमा करून टाकेन;आणि अल्लाहतआला महाकृपानिधी आहे[५] २९

وَاِذْ يَمْكُرُ بِكَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لِيُثْبِتُوْكَ اَوْ يَقْتُلُوْكَ اَوْ يُخْرِجُوْكَ ۭ وَيَمْكُرُوْنَ وَيَمْكُرُ اللّٰهُ ۭ وَاللّٰهُ خَيْرُ الْمٰكِرِيْنَ ﴿٣٠﴾

आणि त्या प्रसंगाचा पण उल्लेख करा, जेव्हा की काफिरलोक आपल्या बाबतीत डावपेंच आखत होते की, आपल्याला अटक करून घ्यावी की, आपल्याला ठार करून टाकावे, किंवा आपणांस आपल्या भूमीतून बाहेर काढून लावावे[६]; आणि ते तर आपले डावपेंच लढवीत होते; आणि अल्लाह आपला डाव लढवत होता; आणि सर्वांत जास्त उत्तम डाव करणारा अल्लाह आहे[७] ३०

وَاِذَا تُتْلٰى عَلَيْهِمْ اٰيٰتُنَا قَالُوْا قَدْ سَمِعْنَا لَوْ نَشَاۗءُ لَقُلْنَا مِثْلَ هٰذَآ ۙ اِنْ هٰذَآ اِلَّآ اَسَاطِيْرُ الْاَوَّلِيْنَ ﴿٣١﴾

आणि जेव्हा यांच्यासमोर आमची महावाक्ये वाचली जातात; तर म्हणतात की, आम्ही ऐकून घेतले; जर आम्ही इरादा करू तर याच्या सारखे आम्हीपण बोलून दाखवू. हे तर काहीच नाही, फक्त बेसनद गोष्टी आहेत; ज्यापूर्वीच्या लोकांकडून चालत आल्या आहेत ३१

وَاِذْ قَالُوا اللّٰهُمَّ اِنْ كَانَ هٰذَا هُوَ الْحَقَّ مِنْ عِنْدِكَ فَاَمْطِرْ عَلَيْنَا حِجَارَةً مِّنَ السَّمَاۗءِ اَوِ ائْتِنَا بِعَذَابٍ اَلِيْمٍ ﴿٣٢﴾

आणि जेव्हा या लोकांनी म्हटले की, हे अल्लाह! जर हे कुरआन खरोखर तुझ्याकडून आहे, तर आमच्यावर आकाशांतून दगडांचा वर्षाव कर! किंवा आमच्यावर कोणी दु:खदायक शिक्षा आण ३२

وَمَا كَانَ اللّٰهُ لِيُعَذِّبَهُمْ وَاَنْتَ فِيْهِمْ ۭ وَمَا كَانَ اللّٰهُ مُعَذِّبَهُمْ وَهُمْ يَسْتَغْفِرُوْنَ ﴿٣٣﴾

आणि अल्लाहतआला असे (कधीही) करणार नाही की, याच्यांत आपण (सल्ल.) असतांना, त्यांना शिक्षा देईल[८]. आणि अल्लाह त्यांना शिक्षा देणार नाही, या अवस्थेत की, ते (त्यांच्यातून कित्येक लोक) क्षमायाचना पण करीत आहेत[९] ३३

१) याच्याने अभिप्रेत, एक तर सेवकांची एक दुसऱ्यावर सत्ता आहे; जे कुठल्याही वैशिष्ट्यांशिवाय, सर्वसाधारण आणि खासवर जुलूम करीत असतात किंवा ती सर्व साधारण शिक्षा आहे, जी अती वृष्टीने किंवा महापूर वगैरे,जे जमिनीवरचे आणि आकाशी संकटाच्या स्वरूपांत येत असतात; आणि पुण्यवान आणि पापी सर्वांवरच त्याचा परिणाम होतो. किंवा हदीसींमध्ये, भलाईचा हुकूम करणे आणि वाईटांपासून मना करणे याला सोडून दिल्याने शिक्षेची जी

चेतावणी दिली गेली आहे, ती अभिप्रेत आहे.

२) यात मक्केतील जीवनाचा खडतरपणा आणि धोक्याचे वर्णन, आणि याच्यानंतर मदीनेच्या जीवनांत, अल्लाहच्या कृपेने, मुसलमानांना जे सुख, चैन आणि संपन्नता लाभली, त्याची चर्चा आहे.

३) अल्लाह आणि पैगंबराचे हक्कांत लबाडी ही आहे की, उघडपणे अल्लाह व पैगंबराचा आज्ञाधारक बनून रहावे; आणि याचा उलट एकांतात गुन्ह्याच्या प्रयत्न करावा. अशाचप्रकारे ही पण लबाडी आहे की, फर्ज केलेल्या गोष्टीतून काही फर्ज सोडून देणे आणि मना केलेल्या गोष्टीतून, कोणी गोष्ट केली जावी. आणि ''तखुनु अमानातिकुम'' चा अर्थ एक मनुष्य दुसऱ्याजवळ जी वस्तू ठेवतो (अमानत) यांच्यात लबाडी करू नये. नबी ﷺ नी पण ठेवीचे संरक्षण करण्याची मोठी ताकीद केली आहे. हदीसमध्ये आहे की, नबी ﷺ आपल्या बहुतेक प्रवचनांमधून हे अवश्य सांगत असत, ''त्याचे ईमान नाही, ज्यांच्यांत ठेवीचे संरक्षण नाही. आणि त्याचा धर्म नाही, ज्याच्यामध्ये दिलेल्या वचनाने पालनाची जाणीव नाही.'' (मुसनद अहमद)

४) संपत्ती आणि संततीचे प्रेमच सर्वसाधारणपणे मनुष्याला लबाडी करण्याला, आणि अल्लाह व रसूलच्या आज्ञापालनापासून पळ काढण्याला, भाग पाडते. म्हणून यांना फितना (कसोटी) ठरविण्यांत आले आहे. म्हणजे यांच्यामार्फत माणसाची कसोटी घेण्यांत येते की, याच्या प्रेमात ठेवी आणि आज्ञापालनाच्या मागण्या पूर्ण करतो किंवा नाही? जर तो पूर्ण करतो, तर समजून घ्या तो या कसोटीत यशस्वी आहे. नाहीतर दुसऱ्या स्थितीत अयशस्वी, या प्रकारांत हीच संपत्ती आणि संतती त्याच्यासाठी अल्लाहच्या शिक्षेला कारणीभूत बनून जाईल.

५) 'तकव्या' चा अर्थ आहे, अल्लाहच्या हुकूमाला विरोध आणि त्याने मना केलेल्या गोष्टीपासून वाचणे. आणि 'फुरकान' चे कित्येक अर्थ वर्णन केले गेले आहेत. उदाहरणार्थ अशी वस्तू जिच्यामुळे सत्त्य आणि असत्त्यांत फरक केला जाऊ शकेल. अर्थ असा आहे की, ईशभयामुळे अंत:करण मजबूत, हुशारी तेज आणि मार्गदर्शनाचा रस्ता स्पष्ट होऊन जातो. ज्यामुळे मनुष्य प्रत्येक अशा प्रसंगी, जेव्हा सर्व सामान्य माणूस शंकाकुशंका आणि फसगतीत पडून जातो, त्याला सरळ मार्गाची सुबुद्धी मिळून जाते. याच्याशिवाय विजय व मदत आणि मुक्ती व संकटातून पार पडून जाण्याचा मार्ग, पण याचा अर्थ केला गेला आहे. आणि सर्वच अर्थ अभिप्रेत होऊ शकतात. कारण ईशभयाने हे सर्व फायदे खचितच् प्राप्त होतात; जेव्हा की याचे बरोबर, पापकर्मे सोडून देणे, झालेल्या पापांबद्दल क्षमायाचना आणि अल्लाहची मोठी कृपा पण प्राप्त होते.

६) हा त्या कारस्थानाचा उल्लेख आहे; जे मक्केच्या सरदारांनी एका रात्री दारूल नद्वा मध्ये रचले होते. आणि सरतेशेवटी असे नक्की करण्यात आले होते की, वेगवेगळ्या घराण्यातील नवतरूणांना आपल्याला ﷺ ठार करण्यासाठी तयार करण्यात यावे. कारण की, कोणा एकाला खुनाच्या बदल्यात ठार न केले जावे; किंबहुना प्राणमूल्य (दियत) अदा करून जीव सुटून जावा.

७) म्हणून या कटाच्या अंतर्गत, एका रात्री हे नवजवान, आपल्या घराबाहेर या प्रतिक्षेत उभे राहिले की, आपण ﷺ बाहेर निघतील; तेव्हा आपल्याला संपवून टाकावे. अल्लाहतआलाने आपणांस ﷺ या कारस्थानाबाबात सावध करून दिले. आणि आपण ﷺ घरांतून बाहेर निघतांना, मातीची एक मूठ भरून घेतली; आणि त्यांच्या डोक्यावर टाकत निघून गेले. कोणास आपण ﷺ च्या निघण्याचा पत्ताच लागला नाही. येथ पावेतो की, आपण ﷺ 'गारेसूर' मध्ये पोहचून गेले. ही काफिरांच्या मुकाबल्यात अल्लाहची चाल होती. त्याहून कोणी उत्तम चाल खेळूशकत नाही. (मकरच्या अर्थासाठी पहा सू.आले इमरान आ.५४ चा समास)

८) म्हणजे पैगंबराच्या उपस्थितीत, लोकांवर शिक्षा येत नाही. या दृष्टीकोनातून आपण ﷺ ची उपस्थितीपण त्यांच्या संरक्षण आणि अभयाला कारणीभूत होती.

९) याच्याने अभिप्रेत हे आहे की, ते लवकरच मुसलमान होऊन क्षमा याचना करतील. किंवा हे की, तवाफ (प्रदक्षिणा) करतांना मुश्रिकीन, ''गुफरानका रब्बना, गुफरानका'' म्हणत असत.

وَمَا لَهُمْ اَلَّا يُعَذِّبَهُمُ اللّٰهُ وَهُمْ يَصُدُّوْنَ عَنِ الْمَسْجِدِ الْحَرَامِ وَمَا كَانُوْٓا اَوْلِيَآءَهٗ ۭ اِنْ اَوْلِيَآؤُهٗٓ اِلَّا الْمُتَّقُوْنَ وَلٰكِنَّ اَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُوْنَ ۝٣٤

**आणि काय गोष्ट आहे की, त्यांना अल्लाहतआलाने शिक्षा देऊ नये? वास्तविक ते लोक मस्जिदे हराम पासून रोकतात, जेव्हा की ते लोक मशिदीचे व्यवस्थापक नाहीत. इचे व्यवस्थापक तर अल्लाहला भिऊन चालणाऱ्या शिवाय, अन्य लोक नाहीत, परंतु यांच्यातून बहुतेक लोक समज ठेवत नाही[१] ३४**

وَمَا كَانَ صَلَاتُهُمْ عِنْدَ الْبَيْتِ اِلَّا مُكَاۗءً وَّتَصْدِيَةً ۭ فَذُوْقُوا الْعَذَابَ بِمَا كُنْتُمْ تَكْفُرُوْنَ ۝٣٥

**आणि त्यांची नमाज 'काब्या' जवळ फक्त ही होती की, शिट्ट्या वाजविणे आणि टाळ्या वाजविणे[२]; म्हणून आपल्या 'कुफ्र' मुळे शिक्षेची गोडी चाखा ३५**

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا يُنْفِقُوْنَ اَمْوَالَهُمْ لِيَصُدُّوْا عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ ۭ فَسَيُنْفِقُوْنَهَا ثُمَّ تَكُوْنُ عَلَيْهِمْ حَسْرَةً ثُمَّ يُغْلَبُوْنَ ڛ وَالَّذِيْنَ كَفَرُوْٓا اِلٰى جَهَنَّمَ يُحْشَرُوْنَ ۝٣٦

**नि:संशय हे काफिरलोक, आपल्या संपत्तीला यासाठी खर्च करतात की, लोकांना अल्लाहच्या मार्गापासून प्रतिबंध करावा. तर हे लोक तर आपल्या संपत्तीला खर्च करीतच राहतील; मग ती संपत्ती त्यांच्यासाठी खेदाला कारणीभूत होऊन जाईल; मग (ते लोक) पराजीत होऊन जातील; आणि काफिर लोकांना नरकाग्नीकडे (एकत्रित) जमा केले जाईल[३] ३६**

لِيَمِيْزَ اللّٰهُ الْخَبِيْثَ مِنَ الطَّيِّبِ وَيَجْعَلَ الْخَبِيْثَ بَعْضَهٗ عَلٰي بَعْضٍ فَيَرْكُمَهٗ جَمِيْعًا فَيَجْعَلَهٗ فِيْ جَهَنَّمَ ۭ اُولٰۗىِٕكَ هُمُ الْخٰسِرُوْنَ ۝٣٧

**कारण की, अल्लाहतआलाने अपवित्रांना पवित्रांपासून वेगळे करून द्यावे[४]; आणि अपवित्रांना एक दुसऱ्यांशी भेटवून द्यावे. म्हणजे या सर्वांना एकत्रित करून टाकावे, मग त्या सर्वांना नरकाग्नीमध्ये झोकून द्यावे; असे लोक पूर्ण तोट्यात आहेत ३७**

قُلْ لِّلَّذِيْنَ كَفَرُوْٓا اِنْ يَّنْتَهُوْا يُغْفَرْ لَهُمْ مَّا قَدْ سَلَفَ ۚ وَاِنْ يَّعُوْدُوْا فَقَدْ مَضَتْ سُنَّتُ الْاَوَّلِيْنَ ۝٣٨

**आपण या काफिरांना सांगून टाका की, जर हे लोक माघार घेतील, तर यांची सर्व पापे, जी पूर्वी होऊन चुकली आहेत, सर्व माफ करून टाकण्यांत येतील[५]; आणि जर आपली तीच सवय ठेवतील; तर पूर्वीच्या (काफिरांच्या) बाबतीत कायदा लागू करून देण्यात आला आहे[६] ३८**

وَقَاتِلُوْهُمْ حَتّٰي لَا تَكُوْنَ فِتْنَةٌ وَّيَكُوْنَ الدِّيْنُ كُلُّهٗ لِلّٰهِ ۚ فَاِنِ انْتَهَوْا فَاِنَّ اللّٰهَ بِمَا يَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ۝٣٩

**आणि तुम्ही त्यांच्याशी येथपर्यंत लढत रहा; की त्यांच्यात फंद फितूर बाकी राहणार[७] नाही; आणि धर्म अल्लाहचाच होऊन जाईल[८]. मग जर हे माघार घेतील, तर अल्लाहतआला त्यांच्या कर्मांना फार चांगल्या प्रकारे पाहत आहे[९] ३९**

وَاِنْ تَوَلَّوْا فَاعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ مَوْلٰىكُمْ ۭ نِعْمَ الْمَوْلٰى وَنِعْمَ النَّصِيْرُ ۝٤٠

**आणि जर तोंड फिरवतील[१०], तर विश्वास बाळगा की, अल्लाहतआला तुमचा मित्र आहे; तो फार चांगला मित्र[११] आहे, आणि फार चांगला मददगार आहे[१२] ४०**

१) म्हणजे ते मुशरिकीन आपल्या स्वत:ला मस्जिदे हराम (खान ए काबा) चा व्यवस्थापक समजत असत. आणि या अनुषंगाने ज्याला इच्छित त्याला तवाफची परवानगी देत, आणि ज्याला इच्छित त्याला देत नसत. म्हणून ते मुसलमानांनापण मस्जिदे हराम मध्ये येण्यापासून प्रतिबंध करीत असत. वास्तविक ते त्याचे व्यवस्थापकच नव्हते; जबरदस्तीने बनून बसले होते. अल्लाहतआलाने फर्माविले याचे व्यवस्थापक तर परहेजगार पापांपासून वाचणारी माणसेच होऊ शकतात आणि मुशरिक (कदापि) नाही. याच्याशिवाय या महावाक्यांत ज्या शिक्षेचा उल्लेख आहे. याच्याने अभिप्रेत मक्केवर विजय आहे; जो मुशरिकांसाठी मोठ्या शिक्षेसारखा आहे. याच्या पूर्वीच्या महावाक्यांत ज्या शिक्षेचे न येणे आहे, जी पैगंबराची उपस्थिती किंवा क्षमायाचना करीत राहिल्याने येत नाही; याच्याने अभिप्रेत मुळापासून नाहीशी करणारी शिक्षा आणि सर्व नष्ट होऊन जाणे आहे. धडा घेण्यासाठी आणि तंबी देण्यासाठी लहान मोठ्या शिक्षा, याच्या विरोधात नाही.

२) मुश्रिकीन ज्याप्रमाणे बैतुल्लाहचा नग्न तवाफ करीत असत, अशाचप्रकारे तवाफच्या दरम्यान ते बोटें तोंडात घालून शिट्ट्या आणि हातांनी टाळ्या वाजवित. याला पण ते उपासना आणि पुण्य समजत असत. ज्याप्रमाणे आजपण

गावंढळ सूफी मशिदीत आणि स्थानांवर नाच करतात, ढोल बडवितात, उलट सुलट उड्या मारतात आणि म्हणतात की हीच आमची नमाज आणि उपासना आहे. नाचून नाचून आम्ही आपल्या मित्राला (अल्लाहला) राजी करून घेऊ. (अशा खुराफतींपासून अल्लाह आम्हांस वाचवो!) (आमीन)

३) जेव्हा मक्केच्या कुरैशचा बद्रमध्ये पराभव झाला; आणि त्याचे हार झालेले लोक, मक्केला परत गेले; तिकडून अबु सुफयान पण आपला व्यापारी काफला घेऊन तेथे पोहचून चुकले होते; तर काही लोक ज्यांचे बाप, मुलगे किंवा भाऊ, या युद्धात मारले गेले होते, अबुसुफयान, आणि ज्यांचा त्या व्यापारी मालांत हिस्सा होता, त्यांचे जवळ गेले; आणि त्यांना विनंती केली की, त्यांनी या मालाला, मुसलमानांशी बदला घेण्यासाठी उपयोगांत आणावे. मुसलमानांनी आम्हाला फार सख्त नुकसान पोहचवले आहे. म्हणून त्यांच्याकडून बदला घेण्यासाठी, युद्ध आवश्यक आहे. अल्लाहतआलाने या महावाक्यांत याच लोकांच्या बाबतीत किंवा अशाप्रकारच्या रवैया धारण करणाऱ्यांच्या बाबतीत म्हटले की, नि:संशय हे लोक, अल्लाहच्या मार्गापासून लोकांना प्रतिबंध करण्याकरीता, आपली संपत्ती खर्च करून टाकोत; परंतु यांच्या वाट्याला खेद आणि पराजयाशिवाय काहीही येणार नाही; आणि परलोकांत त्यांचे ठिकाण नरकाग्नी असेल.

४) हे वेगळे होणे एकतर परलोकांत होईल की, सदाचरणी लोकांना, गुन्हेगार लोकांपासून वेगळे करून दिले जाईल, जसे की फर्माविले, ''हे गुन्हेगारांनो! आज अलग होऊन जा.'' (सू. यासीन-५९) म्हणजे पुण्यवान लोकांपासून. आणि अपराधी म्हणजे काफिर, मुशरिक आणि आज्ञाभंजकांना एकत्र करून सर्वांना नरकाग्नीत टाकून देण्यांत येईल. किंवा मग याचा संबंध या जगाशी आहे. म्हणजे काफिर अल्लाहच्या मार्गापासून प्रतिबंध करण्यासाठी, जी संपत्ती खर्च करीत आहेत; आम्ही त्यांना असे करण्याची संधी देऊ; कारण की, अशा पद्धतीने अल्लाहतआलाने अपवित्राला पवित्रने, काफिरला ईमानवाल्याने आणि ढांभिकाला खऱ्या मुसलमाना पासून वेगळे करून द्यावे. या अनुषंगाने महावाक्यांचा अर्थ होईल, काफिरांच्या मार्फत आम्ही तुमची परीक्षा घेऊ; ते तुमच्याशी लढतील; आणि आम्ही त्यांना त्यांची संपत्ती सुध्दा युद्धावर खर्च करण्याचे सामर्थ्य देऊ, कारण की अपवित्र पवित्रांपासून वेगळे होऊन जावे. मग तो अपवित्रांना एक दुसऱ्याशी मिळवून देईल, म्हणजे सर्वांना एकत्र करून देईन. (इब्ने कसीर)

५) माघार घेण्याचा अर्थ, मुसलमान होणे आहे. ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धा आहे. ''ज्याने इस्लाम कबूल करून, पुण्याचा मार्ग स्वीकारला, त्याच्याकडून त्याच्या त्या अपराधांची विचारपूस होणार नाही, जे त्याने आज्ञानांत केलेले असतील; आणि ज्याने इस्लाम कबूल करून सुद्धा वाईटपणा सोडला नाही; त्याच्या मागच्या पुढच्या सर्व कर्मांची विचारपुस होईल.'' (स.बुखारी, स मुस्लिम) एका आणखी हदीसमध्ये आहे ''इस्लाम त्याच्या पूर्वीच्या गुन्ह्यांना मिटवून टाकतो.'' (मुसनद अहमद)

६) म्हणजे जर ते आपल्या कुफ्र आणि अहंकारावर कायम राहिलेत, तर लवकर किंवा उशिराने अल्लाहच्या शिक्षेचे पात्र बनून राहतील.

७) फितन्याने अभिप्रेत शिर्क आहे; म्हणजे त्यावेळेपर्यंत जिहाद चालू ठेवा की, जो पर्यंत शिर्क संपून जाणार नाही.

८) म्हणजे अल्लाहच्या एकेश्वरवादाचा झेंडा पुन्हा विश्वांत फडकू लागावा.

९) म्हणजे तुमच्याकरीता त्यांचा उघड इस्लामच पुरेसा आहे. आंतला मामला अल्लाहच्या हवाली करून द्या. कारण त्याला जाहीर आणि गुप्त प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे.

१०) म्हणजे इस्लाम कबूल करू नये, आणि आपल्या कुफ्र आणि तुमच्या विरोधावर अडून रहावे.

११) म्हणजे तुमच्या शत्रुंवर तुमचा मददगार आणि तुमची हिमायत करणारा व संरक्षणकर्ता आहे.

१२) फक्त यशस्वी पण तोच होईल, ज्याचा मददगार अल्लाह असेल; आणि जेता पण तोच होईल, ज्याचा मददगार पण तोच आहे.

وَاعْلَمُوٓا أَنَّمَا غَنِمْتُم مِّن شَيْءٍ فَأَنَّ لِلَّهِ خُمُسَهُۥ
وَلِلرَّسُولِ وَلِذِي الْقُرْبَىٰ وَالْيَتَامَىٰ وَالْمَسَاكِينِ
وَابْنِ السَّبِيلِ إِن كُنتُمْ آمَنتُم بِاللَّهِ وَمَآ أَنزَلْنَا
عَلَىٰ عَبْدِنَا يَوْمَ الْفُرْقَانِ يَوْمَ الْتَقَى الْجَمْعَانِ ۗ
وَاللَّهُ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٤١﴾

**लक्षात ठेवा की, तुम्ही, ज्या प्रकारची, जी काही 'गनीमत' प्राप्त कराल[१],** त्याच्यातून पाचवा हिस्सा तर अल्लाहचा आहे. आणि पैगंबराचा, आणि नातेवाईकांचा, आणि अनाथ आणि गरीबांचा, आणि वाटेवर चालणाऱ्या प्रवाशांचा[२], जर तुम्ही अल्लाहवर ईमान आणले असेल; आणि त्या वस्तुवर जी आम्ही आपल्या सेवकांवर त्या दिवशी अवतरीत केली आहे[३], जो दिवस सत्य आणि असत्याचा वेगळे होण्याचा होता[४], ज्या दिवशी दोन्ही सैन्ये (एक दुसऱ्याशी) भिडून गेली होती[५]. आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीवर सर्व सामर्थ्यवान आहे. ४१

إِذْ أَنتُم بِالْعُدْوَةِ الدُّنْيَا وَهُم بِالْعُدْوَةِ الْقُصْوَىٰ
وَالرَّكْبُ أَسْفَلَ مِنكُمْ ۚ وَلَوْ تَوَاعَدتُّمْ لَاخْتَلَفْتُمْ
فِي الْمِيعَادِ ۙ وَلَٰكِن لِّيَقْضِيَ اللَّهُ أَمْرًا كَانَ مَفْعُولًا
لِّيَهْلِكَ مَنْ هَلَكَ عَن بَيِّنَةٍ وَيَحْيَىٰ مَنْ حَيَّ
عَن بَيِّنَةٍ ۗ وَإِنَّ اللَّهَ لَسَمِيعٌ عَلِيمٌ ﴿٤٢﴾

जेव्हा तुम्ही जवळच्या किनाऱ्यावर होते, आणि ते दुरवाल्या किनाऱ्यावर[६] होते, आणि काफला तुमच्या फार खाली होता[७]. जर तुम्ही आपसात ठराव केला असता, तर खचितच तुम्ही ठरविलेल्या वेळेवर पोहचण्यास, वेगवेगळे होऊन गेले असते[८]; परंतु अल्लाहला तर एक काम करूनच टाकावयाचे होते; जे निश्चित होऊन चुकले होते. कारण की जो नाश पावेल, प्रमाणावर (म्हणजे खात्रीपूर्वक जाणून) नाश पावावे. आणि जो जिवंत राहील, तो पण प्रमाणावर (सत्त्याला ओळखून) जिवंत रहावा[९]. नि:संशय अल्लाहतआला खूप ऐकणारा आणि खूप जाणणारा आहे. ४२

إِذْ يُرِيكَهُمُ اللَّهُ فِي مَنَامِكَ قَلِيلًا ۖ وَلَوْ أَرَاكَهُمْ
كَثِيرًا لَّفَشِلْتُمْ وَلَتَنَازَعْتُمْ فِي الْأَمْرِ وَلَٰكِنَّ اللَّهَ
سَلَّمَ ۗ إِنَّهُ عَلِيمٌ بِذَاتِ الصُّدُورِ ﴿٤٣﴾

जेव्हा की अल्लाहतआलाने, आपणास आपल्या स्वप्नांत त्यांची संख्या (खूप) कमी (करून) दाखविली, जर त्यांची अधिकता दाखविता, तर आपण भिऊन गेला असता, आणि या कामाबाबतीत, आपसांत मतभेद करते, परंतु अल्लाहतआलाने वाचवून घेतले. तो मनाअंतर्गत गोष्टींशी खूप वाकबगार आहे[१०]. ४३

وَإِذْ يُرِيكُمُوهُمْ إِذِ الْتَقَيْتُمْ فِي أَعْيُنِكُمْ قَلِيلًا
وَيُقَلِّلُكُمْ فِي أَعْيُنِهِمْ لِيَقْضِيَ اللَّهُ أَمْرًا كَانَ
مَفْعُولًا ۗ وَإِلَى اللَّهِ تُرْجَعُ الْأُمُورُ ﴿٤٤﴾

आणि जेव्हा त्याने (तुमच्या) भिडण्याच्या वेळी, त्यांना आपल्या नजरेत फार कमी दाखविले;आणि आपणास त्यांच्या नजरेत, कमी दाखवावे[११], कारण की, अल्लाहतआलाने त्या कामास शेवटापर्यंत पोहचवून द्यावे, जे करावयाचेच होते[१२]; आणि सर्व कामे अल्लाहकडेच फिरवली जातात ४४

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوٓا إِذَا لَقِيتُمْ فِئَةً فَاثْبُتُوا وَاذْكُرُوا
اللَّهَ كَثِيرًا لَّعَلَّكُمْ تُفْلِحُونَ ﴿٤٥﴾

अहो ईमानवाल्यांनो! जेव्हा तुम्ही कोण्या (शत्रू) सैन्याशी भिडून जाल, तेव्हा खंबीरपणे उभे रहा. आणि अल्लाहतआलाचे खूप स्मरण करा जे की तुम्हास सफलता मिळून जावी[१३] ४५

१) गनीमत ने अभिप्रेत ती संपत्ती आहे, जी काफिरांकडून, काफिरांवर विजय व वर्चस्व प्राप्त झाल्यावर प्राप्त व्हावी. पूर्वींच्या उम्मतींमध्ये यासाठी ही पद्धत होती, की युद्ध संपल्यावर काफिरांकडून मिळालेली सर्व संपत्ती एका ठिकाणी गोळा करून ठेण्यांत येत असे; आकाशातून अग्नी येई, आणि तिला जाळून भस्म करून टाकी. परंतु उम्मते मुस्लिमाला ही गनीमतची संपत्ती विहीत (हलाल) करून ठेण्यात आली. आणि जो माल युद्धाशिवाय, तहाअंतर्गत किंवा जिझीया व महसुलमुळे प्राप्त होई, त्याला 'फय' म्हटले जाते. कधी 'गनीमत' ला पण 'फय' ने अभिप्रेत केले जाते. 'मिन शयअिन्' ने अभिप्रेत जे काही असेल. म्हणजे थोडे असो अथवा जास्त, किंमती असो अथवा मामुली, सर्वांना जमा करून, त्याची वाटणी शिरस्त्याप्रमाणे केली जाईल. कोण्या शिपायाला यातून कोणी वस्तू, वाटणीपूर्वी आपल्याजवळ ठेवण्याची परवानगी नाही. जर कोणी असे करेल तर ती लबाडी (खयानत) होईल.

२) अल्लाहचा शब्द तर बरकतवाला म्हणून, तसेच यासाठी आहे की, प्रत्येक वस्तूंचा खरा मालक तोच आहे. आणि हुकूमपण त्याचाच चालतो. अभिप्रेत, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा वाटा एकच आहे; म्हणजे सर्व गनीमतेच्या संपत्तीचे पाच वाटे करून, चार वाटे तर त्या जिहादमध्ये भाग घेणाऱ्यात वाटले जातील, ज्यांनी युद्धात भाग घेतला.

यात सुद्धा पायी चालणाऱ्याला एक वाटा आणि स्वाराला तिप्पट हिस्सा मिळेल. पाचवा हिस्सा ज्याला अरबीत 'खुमुस' म्हणतात. असे सांगण्यात येते की, याचे पुन्हा पाच वाटे करण्यात येतील. एक हिस्सा रसूलुल्लाह ﷺ चा आणि आपण ﷺ नंतर याचा सार्वजनिक हितासाठी वापर केला जाईल. जसे की, आपण ﷺ पण हा वाटा, मुसलमानांवरच खर्च करीत असत. किंबहुना आपण ﷺ नी फर्माविले पण आहे, ''माझा जो पाचवा हिस्सा आहे, तो पण मुसलमानांच्या भलाईवर खर्च होत असतो.'' (सुनन निसाई) दुसरा हिस्सा रसूलुल्लाह ﷺ च्या नातेवाईकांचा, मग अनाथ,गरीब आणि प्रवाशांचा. आणि सांगण्यात येते की, हा पाचवा वाटा आवश्यकतेप्रमाणे खर्च केला जाईल.

३) या अवतरणाने अभिप्रेत, देवदूतांचे आणि अल्लाहच्या निशाण्या (चमत्कार वैगरे) चे अवतरण आहे, जे बद्र मध्ये झाले.

४) बद्रचे युद्ध, २ हिजरी, १७ रमजानुल मुबारकला झाले. या दिवसाला 'यौमुल फुरकान' यासाठी सांगण्यात आले आहे की, हे काफिर आणि मुसलमाना दरम्यान पहिले युद्ध होते; आणि मुसलमानांना विजय आणि वर्चस्व देऊन स्पष्ट करून देण्यांत आले की, इस्लाम सत्य आहे; आणि कुफ्र आणि शिर्क असत्य आहे.

५) म्हणजे मुसलमान आणि काफिरांची सैन्ये.

६) 'दुनिया' 'दुनवुनयापासून आहे, 'जवळ'च्या अर्थांत. अभिप्रेत तो किनारा जो मदीना शहराच्या जवळ होता. 'कुसवा' म्हणतात दूर ला. काफिर त्या किनाऱ्यावर होते, जो मदिनेपासून त्या दृष्टीने दूर होता.

७) याच्याने अभिप्रेत तो व्यापारी काफला आहे, जो ह.अबुसुफयान ؓ च्या नेतृत्वाखाली, सीरियाहून मक्केला जात होता. आणि त्याला प्राप्त करण्यासाठीच खरे तर, मुसलमान इकडे आले होते. हा डोंगरापासून फार दूर, पश्चिमेकडे उतारावर होता; जेव्हा की, बद्रचे ठिकाण, जेथे युध्द झाले, उंचावर होता.

८) म्हणजे जर युद्धाकरीता कायदेशीर दिवस आणि तारीखचा, एक दुसऱ्याबरोबर वायदा किंवा घोषणा असती, तर विश्वास होता की, कोणताही पक्ष लढाईशिवायच माघार घेता झाला असता. परंतु या युद्धाचे होणे, अल्लाहने लिहून ठेवले होते, म्हणून अशा परिस्थिती निर्माण करून देण्यांत आल्या की, दोन्ही पक्ष बद्रच्या मुक्कामी एक दुसऱ्यासमोर आगाऊ घोषणा किंवा वायद्याशिवाय, समोरासमोर उभे ठाकावे.

९) ही सबब आहे अल्लाहच्या त्या प्रारब्धाच्या मर्जीची ज्याच्या अंतर्गत दोन्ही पक्षांचे भेटणे झाले; कारण जो ईमान वर जिवंत राहील त्याने प्रमाणासह जिवंत रहावे; आणि त्याला भरोसा पटावा की, इस्लाम सत्य आहे. कारण त्याच्या सत्यतेचे प्रत्यक्ष पहाणे, तो बद्रमध्ये करून चुकला आहे. आणि जो कुफ्रसह नाश पावेल, तर तो सुद्धा प्रमाणांसह नाश पावावा; कारण की त्याच्यावर हे स्पष्ट होऊन चुकले आहे की, बहुदेववांद्यां(मुश्रिकीन) चा मार्ग, मार्गभ्रष्टतेचा आणि असत्त्याचा आहे.

१०) अल्लाहतआलाने नबी ﷺ ला स्वप्नात काफिरांची संख्या थोडी दाखविली; आणि तीच संख्या आपण ﷺ नी सहाबा ؓ ला सांगितली; ज्यामुळे त्यांचे धैर्य वाढले. जर याच्या उलट, काफिरांची संख्या जास्त दाखविण्यात आली असती, तर सहाबांचे धैर्य खचणे, आणि आपसात मतभेदाचे भय होते. परंतु अल्लाहने या दोन्ही गोष्टींपासून वाचवून घेतले.

११) कारण की ते काफिरपण, तुम्हास भिऊन मागे हटू नये. पहिली घटना स्वप्नाची होती; आणि हे दाखविणे, युद्धाच्या वेळी होते; जसे की कुरआनाच्या शब्दांनी स्पष्ट होते. तथापि हा मामला सुरवातीला होता. परंतु जेव्हा कायदेशीर युद्ध सुरू होऊन गेले तेव्हा काफिरांना मुसलमान आपल्यापेक्षा दुप्पट दिसत होते. जसे की, सू.आले इम्रान आ.१३ ने माहित होते, नंतर जास्त दाखवण्याचे प्रयोजन असे वाटते की, संख्या बाहुल्य बघून त्यांच्या मनांत भय आणि दहशत बसून जावी; ज्यामुळे त्यांच्यात भित्रेपणा आणि हिंमतीचा अभाव निर्माण व्हावा. याच्या उलट पहिले कमी दाखवण्यांत युक्ती ही होती की, त्यांनी लढण्यापासून पळ काढू नये.

१२) या सर्वांचा उद्देश हा होता की, अल्लाहतआलाने जो निर्णय करून ठेवला होता, तो पूर्ण होऊन जावा. यासाठी त्याने त्याची साधने निर्माण करून दिली.

१३) आता मुसलमानांना युद्धाची ती आचारसंहिता दाखविण्यात येत आहे; जिला शत्रुचा सामना करताना लक्षांत ठेवणे आवश्यक आहे. सर्वांत पहिली गोष्ट, पायांवर खंबीर उभे रहाणे आणि दृढ जमून रहाणे. कारण की, याच्याशिवाय युद्धाच्या मैदानात थांबून रहाणे शक्य नाही. दुसरी सूचना ही की, अल्लाहचे भरपूर नामस्मरण करा. कारण की, मुसलमान जर अल्प असतील, तर त्यांनी अल्लाहच्या मदतीचे इच्छुक असावे; आणि अल्लाहनेपण भरपूर नामस्मरणाने त्यांच्याकडे लक्ष देत रहावे. आणि जर मुसलमान संख्येत जास्त असतील, तर नामस्मरणामुळे, त्यांच्यात घमेंड आणि गर्व निर्माण होऊ नये. किंबहुना खरी दारोमदार अल्लाहच्या मदतीवरच रहावी.

وَاَطِيۡعُوا اللّٰهَ وَرَسُوۡلَهٗ وَلَا تَنَازَعُوۡا فَتَفۡشَلُوۡا وَتَذۡهَبَ رِيۡحُكُمۡ‌ وَاصۡبِرُوۡا‌ ؕ اِنَّ اللّٰهَ مَعَ الصّٰبِرِيۡنَ‌ۚ ۝٤٦

आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालन करा. आपसात भांडत बसू नका; नाहीतर भित्रे होऊन जाल आणि तुमची हवा निघून जाईल; आणि सहनशिलता पत्करा. खचितच्‌ अल्लाहतआला सहनशिल लोकांबरोबर आहे[१]. ४६

وَلَا تَكُوۡنُوۡا كَالَّذِيۡنَ خَرَجُوۡا مِنۡ دِيَارِهِمۡ بَطَرًا وَّرِئَآءَ النَّاسِ وَيَصُدُّوۡنَ عَنۡ سَبِيۡلِ اللّٰهِ‌ ؕ وَاللّٰهُ بِمَا يَعۡمَلُوۡنَ مُحِيۡطٌ ۝٤٧

त्या लोकांसारखे होऊ नका, जे ऐट दाखवत आणि लोकांत डौल दाखवित आपल्या घरातून निघाले; आणि अल्लाहच्या मार्गापासून प्रतिबंध[२] करीत होते. जे काही ते करीत आहेत, अल्लाह त्याला घेरून घेणार आहे. ४७

وَاِذۡ زَيَّنَ لَهُمُ الشَّيۡطٰنُ اَعۡمَالَهُمۡ وَقَالَ لَا غَالِبَ لَـكُمُ الۡيَوۡمَ مِنَ النَّاسِ وَاِنِّىۡ جَارٌ لَّـكُمۡ‌ۚ فَلَمَّا تَرَآءَتِ الۡفِئَتٰنِ نَكَصَ عَلٰى عَقِبَيۡهِ وَقَالَ اِنِّىۡ بَرِىۡٓءٌ مِّنۡكُمۡ اِنِّىۡۤ اَرٰى مَا لَا تَرَوۡنَ اِنِّىۡۤ اَخَافُ اللّٰهَ‌ؕ وَاللّٰهُ شَدِيۡدُ الۡعِقَابِ ۝٤٨

जेव्हा की त्यांची कर्मे शैतान त्यांना शोभायमान करून दाखवित होता आणि (त्यांना) सांगत होता की, (सकल) लोकांतून कोणी पण, आज तुमच्यावर विजयी होऊ शकत नाही; मी स्वत:पण तुमच्या पाठीशी आहे; मग जेव्हा दोन्ही समूह दृष्टीच्या टप्प्यात आले, तर आपल्या टाचेवर मागे सरकून गेला; आणि म्हणू लागला, की मी तर तुमच्यापासून अलिप्त आहे; मी ते पाहत आहे, जे तुम्ही पहात नाही[३]; मी अल्लाहला भितो[४]; आणि अल्लाहतआला शिक्षेत फार कडक[५] आहे. ४८

اِذۡ يَقُوۡلُ الۡمُنٰفِقُوۡنَ وَالَّذِيۡنَ فِىۡ قُلُوۡبِهِمۡ مَّرَضٌ غَرَّ هٰٓؤُلَۤاءِ دِيۡنُهُمۡ‌ؕ وَمَنۡ يَّتَوَكَّلۡ عَلَى اللّٰهِ فَاِنَّ اللّٰهَ عَزِيۡزٌ حَكِيۡمٌ ۝٤٩

जेव्हा की दांभिक लोक म्हणत होते आणि ते पण ज्यांच्या मनात रोग होता[६] की, त्यांना तर त्यांच्या धर्माने धोक्यात टाकून दिले[७] आहे, जो पण अल्लाहवर भरोसा करेल, अल्लाहतआला नि:संशय कुठल्याही शंकेशिवाय परमसमर्थ आणि युक्तिसंपन्न आहे[८]. ४९

وَلَوۡ تَرٰۤى اِذۡ يَتَوَفَّى الَّذِيۡنَ كَفَرُوۡا‌ ۙ الۡمَلٰۤـئِكَةُ يَضۡرِبُوۡنَ وُجُوۡهَهُمۡ وَاَدۡبَارَهُمۡ‌ۚ وَذُوۡقُوۡا عَذَابَ الۡحَرِيۡقِ ۝٥٠

जर तू पाहिले असते, जेव्हा देवदूत काफिरांचे प्राण हरण करतात, त्यांच्या तोंडावर आणि कमरेवर मार मारतात (आणि म्हणतात की,) तुम्ही जळण्याच्या शिक्षेची गोडी चाखा[९] ५०

ذٰ لِكَ بِمَا قَدَّمَتۡ اَيۡدِيۡكُمۡ وَاَنَّ اللّٰهَ لَـيۡسَ بِظَلَّامٍ لِّلۡعَبِيۡدِ ۙ ۝٥١

हे त्या कर्मांमुळे, जे तुमच्या हातांनी पूर्वीच पाठवून दिले आहेत. नि:संशय अल्लाहतआला आपल्या सेवकांवर जुलूम करीत नसतो[१०] ५१

كَدَاۡبِ اٰلِ فِرۡعَوۡنَ‌ ۙ وَالَّذِيۡنَ مِنۡ قَبۡلِهِمۡ‌ ؕ كَفَرُوۡا بِاٰيٰتِ اللّٰهِ فَاَخَذَهُمُ اللّٰهُ بِذُنُوۡبِهِمۡ‌ ؕ اِنَّ اللّٰهَ قَوِىٌّ شَدِيۡدُ الۡعِقَابِ ۝٥٢

फिरऔनाच्या लोकांसारखी गत आणि त्यांच्या पूर्वीच्या लोकांची की[११], त्यांनी अल्लाहच्या निशाण्यांस नाकारले; म्हणून अल्लाहने त्यांच्या पापकर्माबद्दल त्यांना पकडून घेतले. नि:संशय अल्लाहतआला बलवान आणि कडक शिक्षा देणारा आहे. ५२

१) तिसरी सूचना, अल्लाहचे व रसूलचे आज्ञापालन. उघड गोष्ट आहे की, या नाजुक परिस्थितीत, अल्लाहचे व रसूलचे आज्ञाभंजन, किती फारच भयानक होऊ शकते. यासाठी एका मुसलमानासाठी तसे पाहिले असता, प्रत्येक स्थितीत अल्लाह व रसूलचे आज्ञापालन आवश्यक आहे. तथापि युद्धाच्या मैदानात याचे महत्त्व आणखी जास्त होऊन जाते. आणि अशा प्रसंगी थोडेसेपण आज्ञाभंजन अल्लाहच्या मदतीपासून वंचित होण्याला कारणीभूत होऊ शकते. चौथी सूचना ही की, ''आपसात भांडत बसू नका; नाही तर भित्रे होऊन जाल आणि तुमची हवा निघून जाईल'' पांचवी सूचना ही की, सहनशील बना! म्हणजे युद्धात किती का काठिण्य येऊन जावो, आणि तुम्हास कितीही कठीण प्रसंगाचा सामना करावा लागो, परंतु सहनशिलता सुटता कामा नये. नबी ﷺ नी पण एका हदीसमध्ये फर्माविले, ''लोकांनो ! शत्रुशी सामना करण्याची आकांक्षा करू नका; आणि अल्लाहतआला जवळ शांतता आणि भलाई मागत रहा. तथापि जर केव्हा शत्रुशी युद्धाचा प्रसंग येऊन ठेपेल, तर धैर्यशील रहा. (म्हणजे जोरदार प्रतिकार करा) आणि लक्षांत ठेवा, स्वर्ग तलवारीच्या धारेखाली आहे.'' (स.बुखारी)

२) मक्केचे मुशरिक जेव्हा आपल्या काफल्याचे संरक्षण आणि युद्धाच्या इराद्याने निघाले, तर मोठ्या फुशारकीने,

आणि अहंकार आणि गर्व करीत निघाले. मुसलमानांना या काफिरांच्या पद्धतीपासून मना करण्यात आले आहे.
३) मुशरिकीन जेव्हा मक्केहून रवाना झाले, तेव्हा त्यांना आपले प्रतिस्पर्धी घराणे, बनी बकर बिन कनानापासून भय होते की, त्यांनी मागून त्यांचे नुकसान करू नये. जसे की, शैतान सुराका बिन मालीक चे रूप घेऊन आला, जो बनी बकर बिन कनानाचा एक सरदार होता; आणि त्यांना न फक्त विजय आणि वर्चस्वाची खुषखबर दिली; किंबहुना आपल्या समूहाकडून पण पूर्ण पाठिंब्यांचा विश्वास देवविला; परंतु जेव्हा देवदूतांच्या रूपात, अल्लाहची मदत, त्याला दिसून आली, तर आपल्या टाचांवर फिरून पळून गेला.
४) अल्लाहचे भय तर त्यांच्या मनांत काय असेल? परंतु त्याला पक्का भरोसा पटला होता की, मुसलमानांना अल्लाहची खास मदत प्राप्त झाली आहे. मुशरिकीन त्यांच्या सामन्यांत टिकू शकत नाही.
५) शक्य आहे, हा शैतानाच्या म्हणण्याचा भाग असावा, आणि असे पण शक्य आहे की, हे अल्लाह् सुबहानहु व तआलाकडून ते एक स्वतंत्र महावाक्य असेल, ज्याच्या पूर्वीच्या महावाक्याशी अर्थाच्या दृष्टीने तर संबंध असावा, पण शाब्दिक काही संबंध नसावा.
६) याच्याने अभिप्रेत एक तर ते मुसलमान आहेत, जे नवीन नवीन मुसलमान झाले होते; आणि मुसलमानांच्या यशाबद्दल त्यांना शंका होती. किंवा याच्याने अभिप्रेत मुशरिकीन आहेत. आणि हेही शक्य आहे की, मदीनेत रहाणारे यहूदी अभिप्रेत असावेत.
७) म्हणजे याची संख्या तर पहा, आणि साहित्यांची जी संपत्ती आहे; ती पण उघड आहे. आणि हे सामना करण्यास जात आहेत, मक्केच्या मुशरिकांबरोबर; जे संख्येत पण यांच्यापेक्षा कितीतरी जास्त आहेत; आणि सर्व प्रकारचे युद्ध साहित्य व शस्त्रास्त्रांनी संपन्न वाटतात की, त्यांच्या धर्माने त्यांना धोक्यांत आणि फसगतीत टाकून दिले आहे, आणि ठळक गोष्टपण त्यांच्या लक्षात येत नाही.
८) अल्लाहतआलाने फर्मावीले, या काफिरांना, ईमानवाल्यांच्या प्रयत्न, पराकाष्ठा आणि दृढतेचा, काय अंदाच येऊ शकतो? ज्यांचा भरोसा अल्लाहवर आहे. जो प्रतापशाली आहे, आपल्यावर भरोसा करणाऱ्यांना, तो वाऱ्यावर सोडून देत नसतो; आणि बुद्धीमान पण आहे. त्यांच्या प्रत्येक कामांत, बुद्धीची चुणूक आहे. ज्याच्या जाणून घेण्याला, मानवी बुद्धी असमर्थ आहे.
९) काही भाष्यकारांनी याला, बद्रच्या युद्धात ठार झालेल्या मुशरिकीनच्या बाबतीत ठरविले आहे. ह.इब्ने अब्बास ﵁ कडून उल्लेखित आहे, की जेव्हा मुश्रिकिन मुसलमानांकडे येत, तेव्हा मुसलमान त्यांच्या चेहऱ्यावर तलवारी मारीत, ज्याच्यापासून वाचण्यासाठी ते पाठ फिरवून पळ काढत, तेव्हा देवदूत त्यांच्या पार्श्वभागावर तलवारी मारीत. परंतु हे महावाक्य सर्व साधारण आहे. जे प्रत्येक काफिर आणि मुशरिकीन ला समाविष्ट करते. आणि अर्थ हा आहे की, मृत्यूच्या वेळी देवदूत त्यांच्या तोंडावर आणि पाठीवर (किंवा पार्श्वभागावर किंवा कुल्ल्यांवर) मारतात; ज्याप्रमाणे सू.अन्आममध्ये पण सांगण्यांत आले आहे, ''देवदूत त्यांना मारण्यासाठी हात लांब करतात.'' (सू.अन्आम-९३) आणि काही जवळ देवदूतांचे हे मारणे, कयामतच्या दिवशी, नरकाग्नीकडे घेऊन जातांना होईल आणि नरकाग्नीचे रखवालदार म्हणतील, ''तुम्ही जळण्याच्या शिक्षेची गोडी चाखा''
१०) ही मार आणि शिक्षा, तुमच्या आपल्या कर्तृत्वाचा परिणाम आहे; नाहीतर अल्लाहतआला आपल्या सेवकांवर जुलूम करणारा नाही. किंबहुना तो तर न्यायप्रिय आहे. जो प्रत्यक्ष प्रकारच्या जुलूम आणि जबरदस्तीपासून पवित्र आहे. हदीस कुदसीमध्ये सुद्धा आहे, 'अल्लाहतआला फर्मावितो, ''हे माझ्या सेवकांनो! मी आपल्या जीवावर जुलूम निषीद्ध (हराम) केला आहे. आणि मी त्याला तुमच्या दरम्यान पण हराम केले आहे. आतामग तुम्ही एक दुसऱ्यावर जुलूम करु नका. हे माझ्या सेवकांनो ! ही तुमचीच कर्मे आहेत; जी मी मोजून ठेवली आहेत. मग जो आपल्या कर्मांत भलाई पावेल. त्यावर त्याने अल्लाहची स्तुती करावी; आणि जो याच्या विरूद्ध पावेल, तर त्याने आपल्या स्वत:चीच निर्भत्सना करावी.'' (स.मुस्लिम)
११) 'दाबून' चा अर्थ आहे, सवय, 'काफ' उपमा देण्यासाठी आहे. म्हणजे या मुशरिकीनची सवय किंवा स्थिती, अल्लाहच्या पैगंबरांना खोटे ठरविण्यात अशीच आहे, ज्याप्रमाणे फिरऔन आणि त्याच्या पूर्वी दुसऱ्या नाकारणारे या खोटाड्यांची स्थिती किंवा सवय होती.

ذٰلِكَ بِاَنَّ اللّٰهَ لَمْ يَكُ مُغَيِّرًا نِّعْمَةً اَنْعَمَهَا عَلٰى قَوْمٍ حَتّٰى يُغَيِّرُوْا مَا بِاَنْفُسِهِمْ ۙ وَاَنَّ اللّٰهَ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿٥٣﴾

हे यासाठी की अल्लाहतआला असा नाही की कोण्या लोकांवर कोणी देणगी बक्षीस देऊन, मग बदलून टाकेल; तोपर्यंत की ते स्वत: आपल्या या स्थितीला न बदलतील. जी की त्यांची स्वत:ची होती[१]; आणि अल्लाह ऐकणारा आणि जाणणारा आहे. ५३

كَدَاْبِ اٰلِ فِرْعَوْنَ ۙ وَالَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ ؕ كَذَّبُوْا بِاٰيٰتِ رَبِّهِمْ فَاَهْلَكْنٰهُمْ بِذُنُوْبِهِمْ وَاَغْرَقْنَاۤ اٰلَ فِرْعَوْنَ ۚ وَكُلٌّ كَانُوْا ظٰلِمِيْنَ ﴿٥٤﴾

फिरऔनच्या लोकांच्या स्थितीसारखी, आणि त्यांच्या पूर्वीच्या लोकांची की, त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या गोष्टींना खोटे म्हटले; मग त्यांच्या पापकर्मामुळे, आम्ही त्यांना नष्ट केले. आणि फिरऔनच्या लोकांना बुडवून टाकले; हे सर्व जुलूम करणारे होते[२]. ५४

اِنَّ شَرَّ الدَّوَآبِّ عِنْدَ اللّٰهِ الَّذِيْنَ كَفَرُوْا فَهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿٥٥﴾

सर्व जीवधारी प्राण्यात वाईट, अल्लाहजवळ ते आहेत जे 'कुफ्र' करतील;मग त्यांनी ईमान न आणावे[३] ५५

اَلَّذِيْنَ عٰهَدْتَّ مِنْهُمْ ثُمَّ يَنْقُضُوْنَ عَهْدَهُمْ فِيْ كُلِّ مَرَّةٍ وَّهُمْ لَا يَتَّقُوْنَ ﴿٥٦﴾

ज्या लोकांशी आपण करारमदार केला; मग ते आपला करार व मदार प्रत्येक वेळी तोडून टाकतात; आणि जरा पण भीत नाहीत[४] ५६

فَاِمَّا تَثْقَفَنَّهُمْ فِي الْحَرْبِ فَشَرِّدْ بِهِمْ مَّنْ خَلْفَهُمْ لَعَلَّهُمْ يَذَّكَّرُوْنَ ﴿٥٧﴾

मग जेव्हा कधी तू लढाईत यांच्यावर प्रबळ होशील; तर त्यांना असा मार दे, की त्यांच्या मागे असलेले सुद्धा पळून जावेत[५]; शक्य आहे की, हे लोक यापासून बोध घेतील ५७

وَاِمَّا تَخَافَنَّ مِنْ قَوْمٍ خِيَانَةً فَانْۢبِذْ اِلَيْهِمْ عَلٰى سَوَآءٍ ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يُحِبُّ الْخَآئِنِيْنَ ﴿٥٨﴾

आणि तुम्हास कोणा लोकांपासून दगलबाजीचे भय असेल, तर समसमान न्यायाने, त्यांच्याशी झालेला करारमदार तोडून टाका[६], अल्लाहतआला विश्वासघात करणाऱ्यास पसंत करीत नसतो[७] ५८

وَلَا يَحْسَبَنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا سَبَقُوْا ؕ اِنَّهُمْ لَا يُعْجِزُوْنَ ﴿٥٩﴾

काफिरांनी असा विचार करू नये की, ते पळून जातील; खचितच ते हरवू शकत नाहीत ५९

وَاَعِدُّوْا لَهُمْ مَّا اسْتَطَعْتُمْ مِّنْ قُوَّةٍ وَّمِنْ رِّبَاطِ الْخَيْلِ تُرْهِبُوْنَ بِهٖ عَدُوَّ اللّٰهِ وَعَدُوَّكُمْ وَاٰخَرِيْنَ مِنْ دُوْنِهِمْ ۚ لَا تَعْلَمُوْنَهُمْ ۚ اَللّٰهُ يَعْلَمُهُمْ ؕ وَمَا تُنْفِقُوْا مِنْ شَيْءٍ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ يُوَفَّ اِلَيْكُمْ وَاَنْتُمْ لَا تُظْلَمُوْنَ ﴿٦٠﴾

तुम्ही त्यांच्याशी सामन्यासाठी आपल्या शक्ती आणि सामर्थ्याप्रमाणे तयारी करून असा; घोडे बांधून ठेवण्याने[८] की अशाप्रकारे तुम्ही अल्लाहच्या शत्रुंवर आपला धाक बसवून ठेवावा; आणि त्यांच्याशिवाय इतरांवर सुद्धा; ज्यांना तुम्ही ओळखत नाही. अल्लाहतआला त्यांना चांगल्यप्रकारे ओळखतो. अल्लाहच्या मार्गांत जे काही तुम्ही खर्च कराल ते तुम्हास पुरे पुरे भरून दिले जाईल. (आणि तुमचा जुलूम केला जाणार नाही) ६०

وَاِنْ جَنَحُوْا لِلسَّلْمِ فَاجْنَحْ لَهَا وَتَوَكَّلْ عَلَى اللّٰهِ ؕ اِنَّهٗ هُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٦١﴾

आणि जर ते समजोत्याकडे झुकतील तर तू सुद्धा समजोत्याकडे झुक. आणि अल्लाहवर भरोसा ठेव[९]. खचितच तो खूप ऐकणारा आणि जाणणारा आहे. ६१

وَاِنْ يُّرِيْدُوْۤا اَنْ يَّخْدَعُوْكَ فَاِنَّ حَسْبَكَ اللّٰهُ ؕ هُوَ الَّذِيْۤ اَيَّدَكَ بِنَصْرِهٖ وَبِالْمُؤْمِنِيْنَ ﴿٦٢﴾

जर ते आपल्याशी विश्वासघात करू इच्छितील, तर अल्लाह आपणास पुरेसा होईल; त्यानेच आपल्या मदतीने आणि ईमानवाल्यांकडून आपणास पाठबळ दिले आहे. ६२

१) याचा अर्थ हा आहे की, जोपर्यंत कोणी समाज अल्लाहच्या देणग्यांच्या प्रती कृतघ्नता दर्शवून, अल्लाह - तआलाच्या आदेश आणि मनाईकडून विमुख होऊन, आपल्या स्थितीला आणि वागणुकीला बदलत नाही; अल्लाहतआला त्या समाजावर आपल्या देणग्यांचा वर्षाव करणे बंद करीत नाही. दुसऱ्या शब्दात, अल्लाहतआला पापकर्मामुळे आपल्या देणग्या परत खेचून घेतो. आणि अल्लाहतआलाच्या बक्षीसांना पात्र ठरण्यासाठी आवश्यक आहे की, पापकर्मापासून स्वत:ला वाचविले जावे. जणू बदल करण्याचा अर्थ हाच आहे की, समाजाने पापकर्मांना

सोडून, अल्लाहच्या आज्ञापालनाचा मार्ग अनुसरावा.

२) ही त्या गोष्टीची ताकीद आहे जी पहिले येऊन चुकली. तथापि याच्यात नाश होण्याचे स्पष्टीकरण आहे; की त्यांना बुडवून टाकण्यात आले. याशिवाय हे स्पष्ट करून देण्यात आले आहे की, अल्लाहने त्यांना बुडवून त्यांच्यावर जुलूम केला नाही; किंबहुना हे स्वत:च आपल्या जिवांवर जुलूम करीत होते. अल्लाहतर कोणावर जुलूम करीत नाही. वमा रब्बुका बिजल्लामिल् लिल् अबीद (सू. हा मीम सज्दा - ४६)

३) (शर्रून्नास) लोकांमध्ये सर्वांत वाईट म्हणण्याऐवजी त्यांना 'शर्रुद्दव्वाब' म्हणण्यांत आले आहे; जे शब्द कोशीय अर्थाच्या दृष्टीने ते मानव आणि चतुष्पाद वगैरे सर्वांसाठी म्हणण्यात येते. परंतु सर्वसाधारणपणे याचा उपयोग चतुष्पाद करीता होतो. जणू काफिरांचा संबंध मानवाशी नाहीच 'कुफ्र' चा अंगिकार करून ते जनावरे किंवा जनावरांत सुद्धा सर्वांत वाईट जनावरे होऊन गेली आहेत.

४) हे चर्चित काफिरांच्याच एका सवयीचे वर्णन आहे, की प्रत्येक वेळी करारमदार तोडत रहातात. आणि त्याच्या परिणामापासून जरा पण भीत नाहीत. काही लोकांनी याच्याने यहूद्यांचे घराणे बनु कुरैजाला अभिप्रेत धरले आहे; ज्यांच्याशी रसूलुल्लाह ﷺ चा हा करार होता की, ते काफिरांची मदत करणार नाही; परंतु त्यांनी याचे पालन केले नाही.

५) 'शर्रिद् बिहीम' चा अर्थ आहे की, त्यांना असा मार दे की, ज्याच्याने त्यांच्या मागे असलेल्या समूहात आणि साथीदारांत पळापळी होऊन जावी. येथपर्यंत की, ते आपल्याकडे, या भयाने वळणारच नाहीत. की कोठे त्यांचा पण तो परिणाम न व्हावा, जो त्यांच्या पुढील लोकांचा झाला आहे.

६) लबाडीने अभिप्रेत आहे, करार झालेल्या लोकांकडून कराराचा भंग आणि 'अला सवाईन' (समसमान न्यायाच्या स्थितीत) चा अर्थ आहे की, त्यांना कायदेशीररीत्या सूचित करून दिले जावे; की भविष्यांत आमच्या आणि तुमच्या दरम्यान काही करारमदार नाही. कारण की दोन्ही पक्ष आपआपल्या परीने आपल्या संरक्षणाला जबाबदार रहावेत. कुठलाही एक पक्ष अज्ञान आणि चुकीच्या समजुतीत मारला जाऊ नये.

७) म्हणजे हा कराराचा भंग, जर मुसलमानांकडून पण झाला, तर ती लबाडी आहे, जी अल्लाहतआलाला आवडत नाही. ह.मआविया رضي الله عنه आणि रोमन लोकांत करार झाला होता. जेव्हा कराराची मुदत संपायला आली, तेव्हा ह.मआविया رضي الله عنه नी रोमच्या प्रदेशाजवळ आपले सैन्य गोळा करण्यास सुरवात केली. उद्देश्य हा होता की, कराराची मुदत संपल्याबरोबर रोमनांवर हल्ला करून दिला जावा. एक सहाबी ह. अम्र बिन अबसा رضي الله عنه ला जेव्हा ह.मआविया رضي الله عنه ची ही तयारी लक्षात आली तेव्हा त्यांनी याला धोका म्हटले आणि रसूल ﷺ ची एक हदीस सांगून याला कराराच्या विरूद्ध वर्तन ठरविले; ज्यावर ह.मआविया رضي الله عنه नी आपले सैन्य माघारी बोलावून घेतले. (मुसनद अहमद)

८) 'कुव्वतिन' चे भाष्य नबी ﷺ कडून सिद्ध आहे. म्हणजे बाण सोडणे (सहीह मुस्लिम) कारण की त्या काळात हे युद्धातील फार मोठे शस्त्र आणि फार महत्त्वाची कला होती, ज्याप्रमाणे घोडे एक टाळता न येणारी आवश्यकता होती. जसे की, या महावाक्याने पण स्पष्ट आहे पण आता बाण सोडणे आणि घोड्याचे हे युद्ध विषयक महत्त्व आणि त्यांच्यापासून लाभ उठविणे आणि त्यांची आवश्यकता बाकी राहिली नाही; म्हणून 'व अइद्दु लहुम मसततअतुम' च्या अंतर्गत आजकालच्या युद्ध शस्त्रा (मिजाईल,तोफा,बॉम्ब आणि युद्धनौका आणि सामुद्रिक युद्ध करिता पाणबुड्या वगैरे) ची तयारीची अत्यंत आवश्यकता आहे.

९) म्हणजे जर परिस्थिती युद्धाचे ऐवजी तह करण्यासारखी असेल, आणि शत्रुपण तह करण्याला तयार असेल, तर तह करून घेण्यांत काही हरकत नाही. जर तहामुळे शत्रुचा उद्देश्य धोका व फसविणे असेल, तरी सुद्धा घाबरण्याचे कारण नाही. अल्लाहवर भरोसा ठेवावा. खचितच अल्लाह शत्रुच्या फसगती पासूनपण सुरक्षित राखेल. आणि तो तुम्हास पुरेसा आहे. परंतु तहाची ही परवानगी अशा परिस्थितीत आहे, जेव्हा मुसलमान दुर्बल असतील, आणि तहात मुसलमान आणि इस्लामचा फायदा होत असेल. परंतु मामला जेव्हा याच्या उलट असेल, मुसलमान सामर्थ्य आणि शस्त्रांस्त्रात संपन्न असतील आणि काफिर दुर्बल आणि पराजित झालेले असतील, तर या स्थितीत, तहाच्या ऐवजी काफिरांच्या सामर्थ्याला व बळाला तोडणे आवश्यक आहे. ''तर तुम्ही नेभळे बनून, समेटाकडे या परिस्थितीत उतरू नका. जेव्हाकी उच्च आणि वरचढ तुम्हीच राहाल.'' (सू.मोहम्मद-३५) ''आणि तुम्ही त्यांच्याशी इथपावेतो लढा, की त्यांच्यात फिसाद करण्याची हिंमत न रहावी; आणि धर्म अल्लाहचाच होऊन रहावा. (सू. अन्फाल-३९)''

وَاَلَّفَ بَیۡنَ قُلُوۡبِہِمۡ ؕ لَوۡ اَنۡفَقۡتَ مَا فِی الۡاَرۡضِ جَمِیۡعًا مَّاۤ اَلَّفۡتَ بَیۡنَ قُلُوۡبِہِمۡ وَلٰکِنَّ اللّٰہَ اَلَّفَ بَیۡنَہُمۡ ؕ اِنَّہٗ عَزِیۡزٌ حَکِیۡمٌ ﴿۶۳﴾

**त्यांच्या मनात, आपसातील प्रेम सुद्धा त्यानेच टाकले आहे. पृथ्वीवर जे काही आहे, ते सर्वच्या सर्व जरी आपण खर्च करून टाकले असते, तरी सुद्धा यांची मने आपसात मिळू शकला नसतास. ही तर अल्लाहनेच यांच्यात प्रीती निर्माण करून दिली आहे[१]. तो फार सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. (६३)**

یٰۤاَیُّہَا النَّبِیُّ حَسۡبُکَ اللّٰہُ وَمَنِ اتَّبَعَکَ مِنَ الۡمُؤۡمِنِیۡنَ ﴿۶۴﴾

**हे पैगंबरा! आपणास अल्लाह पुरेसा आहे; आणि ते ईमानवाले जे आपले अनुकरण करतात (६४)**

یٰۤاَیُّہَا النَّبِیُّ حَرِّضِ الۡمُؤۡمِنِیۡنَ عَلَی الۡقِتَالِ ؕ اِنۡ یَّکُنۡ مِّنۡکُمۡ عِشۡرُوۡنَ صٰبِرُوۡنَ یَغۡلِبُوۡا مِائَتَیۡنِ ۚ وَاِنۡ یَّکُنۡ مِّنۡکُمۡ مِّائَۃٌ یَّغۡلِبُوۡۤا اَلۡفًا مِّنَ الَّذِیۡنَ کَفَرُوۡا بِاَنَّہُمۡ قَوۡمٌ لَّا یَفۡقَہُوۡنَ ﴿۶۵﴾

**हे पैगंबरा! ईमानवाल्यामध्ये धर्मयुद्धाची आवड निर्माण करा[२]. जर तुमच्यात वीस सुद्धा सहनशील असतील, तर ते दोनशेवर प्रबळ राहतील. आणि तुमच्यात शंभर असतील, तर एक हजार काफिरावर प्रबळ राहतील[३]. यासाठी की ते नासमझ लोक आहेत. (६५)**

१) या महावाक्यात अल्लाहतआलाने नबी ﷺ आणि ईमानवाल्यांवर जे उपकार केलेत; त्यांच्यातून एका मोठ्या उपकाराचा उल्लेख केला आहे. तो हा की, नबी ﷺ ची, ईमानवाल्यांमार्फत मदत केली. ते आपले पाठीराखे, संरक्षणकर्ते आणि मददगार बनून गेले. ईमानवाल्यांवर हा उपकार केला की, त्यांच्या दरम्यान पूर्वी जे शत्रुत्व होते, त्याला प्रेम आणि प्रीतीत बदलून दिले. पूर्वी ते एक दुसऱ्याच्या रक्ताचे तहानलेले होते, आता एक दुसऱ्यावर जीव ओवाळून टाकणारे होऊन गेलेत. पूर्वी एक दुसऱ्याचे हार्दिक शत्रू होते, आता आपसांत दयाळू आणि कनवाळू होऊन गेलेत. शेकडो वर्षे जुन्या आपसांतील वैराला, अशा प्रकारे संपवून, आपसांत प्रेम निर्माण करून देणे, ही अल्लाहतआलाची विशेष कृपा, आणि त्याचे सामर्थ्य आणि इच्छा याचेच कृत्य होते, नाहीतर हे असे काम होते की, जगांतील सर्व खजीने जरी यावर खर्च करून टाकले असते, तरी सुद्धा हे लक्ष्य साध्य झाले नसते. अल्लाहतआलाने या उपकाराचा उल्लेख, सू.आले इमरान– १०३ ''तुम्ही एक दुसऱ्याचे शत्रू होते तर अल्लाहने तुमच्या मनात प्रीती टाकून दिली.'' यात पण केला आहे. आणि नबी ﷺ नी पण, हुनैनच्या गनीमतच्या वेळी, अन्सारला संबोधित करून सांगितले की, ''हे अन्सारच्या समूहांनो! काय हे खरे नाही की तुम्ही मार्गभ्रष्ट होता, अल्लाहने माझ्या मार्फत तुम्हाला मार्गदर्शन केले. तुम्ही विपन्नावस्थेत होता, अल्लाहने माझ्या मार्फत तुम्हाला सुसंपन्न बनवून टाकले. आणि तुम्ही एक दुसऱ्यापासून वेगवेगळे होता, अल्लाहने माझ्या मार्फत तुम्हास आपसात जोडून दिले.'' नबी ﷺ जी गोष्ट सांगत, अन्सार याच्या उत्तरात हेच सांगत, ''अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे उपकार याच्यापेक्षा कितीतरी अधिक आहेत.'' (स.बुखारी व स.मुस्लिम)

२) तहरीज चा अर्थ आहे, प्रोत्साहन देण्यात पराकाष्टा करणे. म्हणजे खूप प्रोत्साहन देणे आणि आवड निर्माण करणे. म्हणून याच्याप्रमाणे नबी ﷺ युद्धापूर्वी सहाबा ؓ ला जिहादसाठी प्रोत्साहन देत असत; आणि त्याचे महत्त्व वर्णन करून सांगत. जसे की बद्रच्या प्रसंगी, जेव्हा मुशरिकीन आपली भरपूर संख्या आणि भरपूर शस्त्र साहित्यासह रणांगणांत उतरले; आपण ﷺ नी सांगितले, ''अशा स्वर्गात जाण्यास तयार होऊन जा; ज्याची रूंदी, आकाश आणि पृथ्वीच्या बरोबर आहे.'' एक सहाबी ؓ उमैर बिन हमामने म्हटले, ''याची रूंदी आकाश आणि पृथ्वीच्या बरोबर आहे? रसूलुल्लाह ﷺ नी सांगितले, ''होय.'' यावर वाहवा वाहवा म्हटले आणि आनंदाचे प्रदर्शन केले. आणि ही आशा व्यक्त केली की, मी पण स्वर्गात जाणाऱ्यांपैकी होईल. आपण ﷺ नी फर्माविले, ''तुम्ही यांत जाणाऱ्यांपैकी व्हाल.'' तेव्हा त्याने आपल्या तलवारीचे म्यान तोडून टाकले; आणि खजुरी काढून खाऊ लागला; मग ज्या वाचल्या, हाताने फेकून दिल्या; आणि म्हटले, ''याच्या खाण्यापर्यंत मी जिवंत राहिलो, तर ते तर मोठेच दिर्घ जीवन असेल.'' मग पुढे सरसावले, आणि बहादुरीचे गुणगाण करु लागले; येथ पावेतो की शेवटी हौतात्म्य पत्करले. रजी. अल्लाहु अनहु (स.मुस्लीम)

३) ही मुसलमानांसाठी खुषखबर आहे की, तुमचे दृढ निश्चयाने लढणारे वीस योद्धे दोनशेवर आणि शंभर, एक हजारवर भारी होतील.

ٱلۡـَٔـٰنَ خَفَّفَ ٱللَّهُ عَنكُمۡ وَعَلِمَ أَنَّ فِيكُمۡ ضَعۡفٗاۚ
فَإِن يَكُن مِّنكُم مِّاْئَةٞ صَابِرَةٞ يَغۡلِبُواْ مِاْئَتَيۡنِۚ
وَإِن يَكُن مِّنكُمۡ أَلۡفٞ يَغۡلِبُوٓاْ أَلۡفَيۡنِ بِإِذۡنِ ٱللَّهِۗ
وَٱللَّهُ مَعَ ٱلصَّٰبِرِينَ ٦٦

**बरे, तर आता अल्लाह तुमचे ओझे कमी करीत आहे. तो खूप चांगल्या रीतीने जाणतो की तुमच्यात दौर्बल्य आहे. मग जर तुमच्यात शंभर सहनशील असतील, तर ते दोनशेवर प्रबळ राहतील[१]. आणि जर तुमच्यातून एक हजार असतील, तर ते अल्लाहच्या हुकूमाने दोन हजारावर प्रबळ राहतील. अल्लाह सहनशील लोकांबरोबर[२] आहे.** ६६

مَا كَانَ لِنَبِيٍّ أَن يَكُونَ لَهُۥٓ أَسۡرَىٰ حَتَّىٰ يُثۡخِنَ فِي
ٱلۡأَرۡضِۚ تُرِيدُونَ عَرَضَ ٱلدُّنۡيَا وَٱللَّهُ يُرِيدُ
ٱلۡأٓخِرَةَۗ وَٱللَّهُ عَزِيزٌ حَكِيمٞ ٦٧

**पैगंबराच्या ताब्यात कैदी असायला नको; जोपर्यंत देशांत, चांगल्याप्रकारे रणकंदन होऊन जाणार नाही. तुम्ही तर इहलौकीक मालमत्तेची अभिलाषा बाळगतात; आणि अल्लाहचा इरादा तर परलोकाचा आहे[३]. आणि अल्लाह सामर्थ्यशाली (आणि) युक्तिवान आहे** ६७

لَّوۡلَا كِتَٰبٞ مِّنَ ٱللَّهِ سَبَقَ لَمَسَّكُمۡ فِيمَآ أَخَذۡتُمۡ
عَذَابٌ عَظِيمٞ ٦٨

**जर पूर्वीपासूनच अल्लाहकडे (ही) गोष्ट लिहिलेली नसती; तर[४] जे काही तुम्ही घेतले आहे; याच्या बाबतीत तुम्हांस कोणी मोठी शिक्षा झाली असती.** ६८

१) मागचा हुकूम सहाबा ﷺ ला फार जड वाटला; कारण याचा अर्थ होता, एक मुसलमान, दहा काफिराकरीता, वीस दोनशेकरीतां, आणि शंभर, एक हजारांसाठी पुरेसे आहेत. आणि काफिरांच्या सामन्यांसाठी, मुसलमानांची इतकी संख्या असेल, तर जिहाद फर्ज आणि याच्यापासून तोंड फिरवणे, अयोग्य आहे; म्हणून अल्लाहतआलाने यांत कमी करून, एकास दोनचे प्रमाण करून दिले. (स.बुखारी तफसीर सू.अन्फाल)

२) हे सांगून सहनशिलता आणि दृढ जमून रहाण्याचे महत्त्व विशद करून दिले की, अल्लाहची मदत मिळविण्यासाठी याचे पालन करणे आवश्यक आहे.

३) बद्रच्या युद्धात सत्तर काफिर मारले गेले; आणि सत्तरच कैदीपण बनविले गेले. हा कुफ्र आणि इस्लामचा कारण की पहिलाच युद्धप्रसंग होता; म्हणून कैद्यांच्या बाबतीत काय धोरण स्वीकारले जावे? याबाबत आदेश पूर्णपणे स्पष्ट नव्हते. म्हणू न नबी ﷺ नी, या सत्तर कैद्यांच्या बाबतीत सल्ला मसलत केली की, काय केले जावे? त्यांना ठार मारून टाकले जावे की, प्राणमूल्य घेऊन सोडून दिले जावे? म्हणूनच दोन्ही गोष्टी विचारार्थ आल्या. परंतु काही वेळा, प्रंतु परिस्थितीच्या अनुषंगाने जास्त चांगला प्रकार अंगिकारण्याची आवश्यकता असते. येथे पण जास्त चांगल्या प्रकारे अंगिकारण्याची आवश्यकता होती. परंतु शक्यतेला समोर ठेवून कमी प्रकार अंगिकारण्यात आला. ज्यावर अल्लाहतआलाकडून नाराजगी अवतरीत झाली. सल्ला मसलतीत ह.उमर ﷺ वगैरेंनी हा सल्ला दिला की, कुफ्रच्या शक्तीला आणि अहंकाराला तोडण्यासाठी आवश्यक आहे की, या कैद्यांना ठार केले जावे; कारण की हे कुफ्र व काफिरांचे पुढारी आहेत; हे स्वतंत्र होऊन, इस्लाम आणि मुसलमानांच्या विरूद्ध जास्त कारस्थाने करतील. जेव्हा की, ह.अबुबकर ﷺ वगैरेंचे मत याच्या विरूद्ध हे होते की, प्राणमूल्य घेऊन, त्यांना सोडून देण्यात यावे. आणि या संपत्तीपासून पुढील युद्धाची तयारी केली जावी. नबी ﷺ नी पण याच मताला पसंती दर्शविली. ज्यावर हे आणि याच्या नंतरचे महावाक्य अवतरीत झाले. 'हत्ता युसखिना फिल् अर्ज' चा अर्थ आहे की, जर देशांत 'कुफ्र' चे वर्चस्व आहे (जसे की यावेळी अरबस्थानात 'कुफ्र' चे वर्चस्व होते.) तर काफिरांना ठार करून, कुफ्रचे सामर्थ्य तोडणे आवश्यक आहे. या मुद्दयाला दृष्टीआड करून, तुम्ही जे प्राणमूल्य कबूल केले आहे; तर जणू जास्त चांगल्या प्रकाराला सोडून हलक्या प्रकाराला स्वीकारले आहे, ही तुमची चूक आहे. मग जेव्हा कुफ्रचे वर्चस्व संपून गेले, तेव्हा कैद्यांच्या बाबतीत त्या त्या वेळच्या हाकिमांना अधिकार देऊन देण्यात आला की, ते इच्छितील तर ठार करून टाकावे, प्राणमूल्य घेऊन सोडून द्यावे, किंवा मुसलमान कैद्यांच्या बरोबर अदलाबदल करून घ्यावी. आणि इच्छा असेल तर गुलाम (दास) करून घ्यावे. परिस्थितीप्रमाणे कोणताही प्रकार अंगिकारणे योग्य आहे.

४) यात भाष्यकारांचा मतभेद आहे की, लिहिलेली गोष्ट काय होती. काहींनी म्हटले याच्याने माले गनीमत हलाल होणे अभिप्रेत आहे. कारण की, हा नशीबाचा लेख होता की, मुसलमानांसाठी गनीमतचा माल हलाल (विहीत) होईल. म्हणून तुम्ही प्राणमूल्य घेऊन एक योग्य कामच केले आहे. जर असे नसते, तर तुम्हाला प्राणमूल्य घेण्याचे कारणाने मोठी शिक्षा झाली असती. काहींनी याच्याने बद्रवाल्यांची माफी अभिप्रेत धरली आहे. काहींनी रसूल ﷺ ची उपस्थितीला शिक्षा न होण्याला अभिप्रेत केले आहे, वगैरे (तपशिलासाठी पहावे फत्हुल कदीर)

فَكُلُوا مِمَّا غَنِمْتُمْ حَلٰلًا طَيِّبًا ۖ وَّاتَّقُوا اللّٰهَ ۭ اِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٦٩﴾

तर मग जी काही हलाल आणि चोखी 'गनीमत' तुम्ही मिळविली आहे; त्याला भरपूर खा आणि प्या[१]; आणि अल्लाहला भीत रहा. खचितच अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (٦٩)

يٰٓاَيُّهَا النَّبِيُّ قُلْ لِّمَنْ فِيْٓ اَيْدِيْكُمْ مِّنَ الْاَسْرٰٓى ۙ اِنْ يَّعْلَمِ اللّٰهُ فِيْ قُلُوْبِكُمْ خَيْرًا يُّؤْتِكُمْ خَيْرًا مِّمَّآ اُخِذَ مِنْكُمْ وَيَغْفِرْ لَكُمْ ۭ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٧٠﴾

हे पैगंबरा! आपल्या हाताखालील कैद्यांना सांगून द्या की,जर अल्लाहतआला तुमच्या मनांत चांगुलपणा पाहील[२], तर जे काही तुमच्यापासून घेतले गेले आहे, त्याच्यापेक्षा उत्तम तुम्हास देईल[३]. आणि मग तुमची पापे पण क्षमा करील. आणि अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (٧٠)

وَاِنْ يُّرِيْدُوْا خِيَانَتَكَ فَقَدْ خَانُوا اللّٰهَ مِنْ قَبْلُ فَاَمْكَنَ مِنْهُمْ ۭ وَاللّٰهُ عَلِيْمٌ حَكِيْمٌ ﴿٧١﴾

आणि जर ते तुमच्याशी लबाडीचा इरादा करतील, तर हे तर याच्यापूर्वीच अल्लाहशी लबाडी करून चुकले आहेत. शेवटी त्याने यांना अटक करवून दिली[४]. आणि अल्लाह (सर्व) ज्ञानी आणि युक्तिवान आहे (٧١)

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَهَاجَرُوْا وَجٰهَدُوْا بِاَمْوَالِهِمْ وَاَنْفُسِهِمْ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ وَالَّذِيْنَ اٰوَوْا وَّنَصَرُوْٓا اُولٰۗىِٕكَ بَعْضُهُمْ اَوْلِيَاۗءُ بَعْضٍ ۭ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَلَمْ يُهَاجِرُوْا مَا لَكُمْ مِّنْ وَّلَايَتِهِمْ مِّنْ شَيْءٍ حَتّٰي يُهَاجِرُوْا ۚ وَاِنِ اسْتَنْصَرُوْكُمْ فِي الدِّيْنِ فَعَلَيْكُمُ النَّصْرُ اِلَّا عَلٰي قَوْمٍۢ بَيْنَكُمْ وَبَيْنَهُمْ مِّيْثَاقٌ ۭ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ﴿٧٢﴾

ज्या लोकांनी ईमान आणले, आणि स्वदेश त्याग केला; आणि आपल्या संपत्तीने आणि जीवांनी, अल्लाहच्या मार्गांत धर्मयुद्ध केले[५]; आणि ज्या लोकांनी त्यांना जागा दिली, आणि (त्यांची) मदत केली[६]; हे सर्व आपसांत एक दुसऱ्याचे मित्र आहेत[७]. आणि ज्यांनी ईमान तर आणले आहे, परंतु स्वदेशत्याग (हिजरत) केला नाही; तुमच्यासाठी त्यांची काही पण मित्रता नाही, जोपर्यंत ते स्वदेशत्याग करीत नाहीत[८]. होय, जर ते तुमच्याशी धर्माच्या बाबतीत मदतीची याचना करतील, तर तुमच्यावर (त्यांची) मदत करणे जरूरी आहे[९]. शिवाय त्या लोकांच्या की, तुमच्यात आणि त्यांच्यात करार मदार झाला असेल[१०]; तुम्ही जे काही करीत आहांत, त्याला अल्लाह चांगल्या प्रकारे पहात आहे. (٧٢)

وَالَّذِيْنَ كَفَرُوْا بَعْضُهُمْ اَوْلِيَاۗءُ بَعْضٍ ۭ اِلَّا تَفْعَلُوْهُ تَكُنْ فِتْنَةٌ فِي الْاَرْضِ وَفَسَادٌ كَبِيْرٌ ﴿٧٣﴾

काफिर आपसांत एक दुसऱ्याचे मित्र आहेत. जर तुम्ही असे केले नाही तर, देशांत गडबड, गोंधळ होईल आणि मोठा फिसाद होऊन जाईल[११] (٧٣)

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَهَاجَرُوْا وَجٰهَدُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ وَالَّذِيْنَ اٰوَوْا وَّنَصَرُوْٓا اُولٰۗىِٕكَ هُمُ الْمُؤْمِنُوْنَ حَقًّا ۭ لَهُمْ مَّغْفِرَةٌ وَّرِزْقٌ كَرِيْمٌ ﴿٧٤﴾

ज्या लोकांनी ईमान आणले, आणि स्वदेश त्याग केला आणि अल्लाहच्या मार्गांत 'जिहाद' केले आणि ज्यांनी जागा दिली आणि मदत केली; हेच लोक खरे ईमानवाले आहेत, त्यांच्यासाठी क्षमा आहे, आणि सन्मानाची आजिविका[१२] (आहे.) (٧٤)

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا مِنْۢ بَعْدُ وَهَاجَرُوْا وَجٰهَدُوْا مَعَكُمْ فَاُولٰۗىِٕكَ مِنْكُمْ ۭ وَاُولُوا الْاَرْحَامِ بَعْضُهُمْ اَوْلٰى بِبَعْضٍ فِيْ كِتٰبِ اللّٰهِ ۭ اِنَّ اللّٰهَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿٧٥﴾

आणि ज्या लोकांनी याच्यानंतर ईमान आणले, आणि स्वदेशत्याग केला, आणि तुमच्या बरोबर मिळून 'जिहाद' केले; तर हे लोक पण तुमच्यातूनच[१३] आहेत. आणि नातेवाईक, यांच्यातून काही, काहींच्या जास्त जवळ आहेत; अल्लाहच्या ग्रंथात[१४]. नि:संशय अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीला जाणणारा आहे. (٧٥)

१) यात गनीमतच्या मालाला हलाल आणि चोखा वर्णन करून प्राणमुल्याला मान्यता देण्यात आली. ज्यामुळे या आदेशांचे समर्थन होते की, ''लिहिलेल्या गोष्टीने'' अभिप्रेत कदाचित हेच गनीमतच्या संपत्तीचे हलाल होणे आहे.

२) म्हणजे ईमान आणि इस्लाम आणण्याचा इरादा, आणि त्याला मान्य करण्याची भावना.

३) म्हणजे जे प्राणमूल्य तुमच्यापासून घेण्यात आले आहे. याच्यापेक्षा उत्कृष्ट तुम्हास अल्लाहतआला इस्लाम कबूल

केल्यानंतर देईन. आणि झालेही तसेच. ह.अब्बास ﷺ वगैरे, जे या कैद्यात होते, मुसलमान होऊन गेलेत; तर यानंतर अल्लाहतआलाने त्यांना ऐहिक संपत्ती व धनदौलत पण खूप दिले.

४) म्हणजे तोंडाने तर इस्लाम जाहीर केला; परंतु उद्देश धोका देणे आहे; तर याच्यापूर्वी त्यांनी कुफ्र आणि शिर्कचा अंगिकार करून काय मिळविले? हेच की ते मुसलमानांचे कैदी बनून गेलेत. म्हणून पुढे सुद्धा जर ते शिर्कच्या मार्गावर कायम राहिले, तर यापेक्षा जास्त, अपमान आणि अप्रतिष्ठेशिवाय त्यांना काहीही प्राप्त होणार नाही.

५) हे सहाबा ﷺ मुहाजिरीन (स्वदेश त्याग करणारे) म्हणविले जातात; जे श्रेष्ठत्वांत, सहाबांमध्ये पहिल्या क्रमांकावर आहेत.

६) हे अन्सार (मदत करणारे) म्हणविले जातात; जे श्रेष्ठत्वांत, दुसऱ्या क्रमांकांवर आहेत.

७) म्हणजे एक दुसऱ्याची बाजू घेणारे आणि मददगार आहेत. आणि काहींनी म्हटले आहे की, एक दुसऱ्याचे वारस आहेत. जसे की हिजरत नंतर रसूलुल्लाह ﷺ नी, एक एक मुहाजीर आणि एक एक अन्सार यांच्या दरम्यान, भावाचे नाते कायम करून दिले होते; येथपर्यंत की, ते एक दुसऱ्याचे वारसपण बनत असत. (नंतर वारसाहक्काचा हुकूम रद्द करण्यात आला.)

८) हा सहाबांचा तिसरा प्रकार आहे; जो मुहाजिरीन आणि अन्सार शिवाय आहे. हे मुसलमान झाल्यानंतर आपल्याच इलाख्यात आणि घराण्यात कायम राहिलेत. म्हणून सांगण्यात आले की, ते आपला वारसहक्काला पात्र नाहीत.

९) मुशरिकीनच्या विरूद्ध जर त्यांना तुमच्या मदतीची गरज भासली, तर मग त्यांची मदत करणे आवश्यक आहे.

१०) होय; जर ते तुमच्याकडून अशा लोकांच्या विरूद्ध मदत इच्छित असतील, की तुमच्यात आणि त्यांच्यात समझोता आणि युद्ध न करण्याचा करार आहे; तर मग मुसलमानांची बाजू घेण्याच्या तुलनेत, कराराचे पालन जास्त आवश्यक आहे.

११) म्हणजे ज्याप्रमाणे काफिर एक दुसऱ्याचे मित्र आणि पक्ष घेणारे आहेत, त्याचप्रमाणे तुम्ही सुद्धा ईमानाच्या आधारावर, एक दुसऱ्याची मदत, आणि काफिरांशी संबंध तोडला नाही; तर मग मोठा फितना आणि फिसाद होईल. आणि तो हा की ईमानवाले आणि काफिरांचे आपसात मेळ मिलाप, प्रेम आणि दोस्ती यामुळे धर्माच्या बाबतीत, शंका आणि चापलुसी निर्माण होईल. काहींनी ''बअज़्हुम औलियाऊ बाज'' ने वारसदार होणे अभिप्रेत धरले आहे. म्हणजे काफिर एक दुसऱ्याचे वारीस आहेत. आणि अर्थ हा आहे की, एक मुसलमान कोण्या काफिराचा, आणि काफिर कोण्या मुसलमानाचा वारीस नाही. जसे की हदीशीमध्ये याला खुलाशाने स्पष्ट करून दिले आहे. जर तुम्ही वारसा हक्कात, कुफ्र आणि ईमानला दृष्टीआड करून, निव्वळ नाते संबंधाला समोर ठेवाल, तर याच्याने मोठा फितना आणि फिसाद निर्माण होईल.

१२) ही मुहाजिरीन आणि अन्सार याच दोन समूहांची चर्चा आहे; जी पहिले पण येऊन चुकली आहे. या ठिकाणी दुसऱ्यादा त्यांचा उल्लेख त्यांच्या श्रेष्ठत्वाच्या अनुषंगाने आहे. जेव्हा की पहिल्यादा त्यांचा उल्लेख, आपसात एक दुसऱ्याचा पक्ष धरणे आणि मदत करणे आवश्यक असल्याच्या वर्णनांत होता.

१३) हा एक चौथ्या समूहाचा उल्लेख आहे, जो श्रेष्ठत्वांत पहिल्या दोन समूहानंतर, आणि तिसऱ्या समूहापासून ज्याने स्वदेश त्याग केला नव्हता, प्रथम आहे.

१४) भाईचारा किंवा शपथेच्या आधारावर, मृताने सोडलेल्या संपत्तीत (विरासत) जे हिस्सेदार बनत असत; या महावाक्याने त्याला रद्द करून टाकण्यात आले. आता वारस फक्त तेच होतील जे वंशाशी आणि सासुरवाडीच्या नात्यांशी निगडीत असतील. अल्लाहचे पुस्तक किंवा अल्लाहच्या हुकूमाने अभिप्रेत आहे, म्हणजे लौहे महफुज मध्ये मूळ हुकूम हाच होता. परंतु भाईचाऱ्याच्या आधारावर, फक्त तात्पुरत्या स्वरूपात, एक दुसऱ्याचा वारस बनवून देण्यात आले होते. जो आता आवश्यकता संपल्यामुळे, अनावश्यक होऊन गेला; आणि मूळ हुकूम लागू करून देण्यात आला.

महावाक्ये १२९ | (९) सू. तौबा [१] | रुकूअ १६

آياتها ١٢٩ (٩) سُوْرَةُ التَّوْبَةِ مَدَنِيَّةٌ (١١٣) رُكوعاتها ١٦

بَرَآءَةٌ مِّنَ اللّٰهِ وَ رَسُوْلِهٖۤ اِلَى الَّذِيْنَ عٰهَدْتُّمْ مِّنَ الْمُشْرِكِيْنَ ۝١

अल्लाह आणि त्याच्या पैगंबराकडून अलिप्त होण्याची घोषणा[२] आहे; त्या मुशरिकांच्या बाबतीत, ज्यांच्याशी तुम्ही करारमदार केला होता. ①

فَسِيْحُوْا فِى الْاَرْضِ اَرْبَعَةَ اَشْهُرٍ وَّ اعْلَمُوْۤا اَنَّكُمْ غَيْرُ مُعْجِزِى اللّٰهِ ۙ وَ اَنَّ اللّٰهَ مُخْزِى الْكٰفِرِيْنَ ۝٢

तर (हे मुशरिकांनो!) तुम्ही देशात तर चार महिने चालून फिरून घ्या.[३] आणि हे लक्षात ठेवा की, कोण्याही प्रकारे तुम्ही अल्लाहला विवश करु शकणार नाहीत(आणि हे पण लक्षात ठेवा) अल्लाह काफिरांना फजीत करणार आहे[४] ②

وَ اَذَانٌ مِّنَ اللّٰهِ وَ رَسُوْلِهٖۤ اِلَى النَّاسِ يَوْمَ الْحَجِّ الْاَكْبَرِ اَنَّ اللّٰهَ بَرِىْٓءٌ مِّنَ الْمُشْرِكِيْنَ ۙ۬ وَ رَسُوْلُهٗ ؕ فَاِنْ تُبْتُمْ فَهُوَ خَيْرٌ لَّكُمْ ۚ وَ اِنْ تَوَلَّيْتُمْ فَاعْلَمُوْۤا اَنَّكُمْ غَيْرُ مُعْجِزِى اللّٰهِ ؕ وَ بَشِّرِ الَّذِيْنَ كَفَرُوْا بِعَذَابٍ اَلِيْمٍ ۝٣

आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबराकडून, लोकांना मोठ्या हजच्या दिवशी[५] जाहीर करण्यात येते की, अल्लाह मुशरिकाकडून अलिप्त आहे, आणि त्याचा पैगंबर सुद्धा; जर आतासुद्धा तुम्ही तौबा करून घ्याल, तर हे तुमच्या करीता बरे आहे. आणि जर तुम्ही तोंड फिरवाल, तर लक्षात असू द्या की तुम्ही अल्लाहला विवश करु शकत नाही; आणि काफिरांना दु:ख दायक शिक्षेची खबर ऐकवून द्या ③

اِلَّا الَّذِيْنَ عٰهَدْتُّمْ مِّنَ الْمُشْرِكِيْنَ ثُمَّ لَمْ يَنْقُصُوْكُمْ شَيْـًٔا وَّ لَمْ يُظَاهِرُوْا عَلَيْكُمْ اَحَدًا فَاَتِمُّوْۤا اِلَيْهِمْ عَهْدَهُمْ اِلٰى مُدَّتِهِمْ ؕ اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الْمُتَّقِيْنَ ۝٤

त्या मुश्‌रिकांशिवाय, ज्यांच्याशी तुमचा करारमदार होऊन चुकला आहे, आणि त्यांनी तुम्हाला, जरा पण नुकसान पोहचविले नाही; न कोणाची तुमच्या विरोधांत मदत केली आहे, तर तुम्ही सुद्धा त्यांच्या करारमदाराची मुदत, त्यांच्याबरोबर पूर्ण करा[६]. अल्लाहतआला ईशभय बाळगणाऱ्यांशी प्रीती राखतो. ④

فَاِذَا انْسَلَخَ الْاَشْهُرُ الْحُرُمُ فَاقْتُلُوا الْمُشْرِكِيْنَ حَيْثُ وَجَدْتُّمُوْهُمْ وَ خُذُوْهُمْ وَ احْصُرُوْهُمْ وَ اقْعُدُوْا لَهُمْ كُلَّ مَرْصَدٍ ۚ فَاِنْ تَابُوْا وَ اَقَامُوا الصَّلٰوةَ وَ اٰتَوُا الزَّكٰوةَ فَخَلُّوْا سَبِيْلَهُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ۝٥

मग आदर सन्मानाचे महिने[७] निघून जाताच, मुश्‌रिकांना जेथे पावाल, ठार करा[८], त्यांना कैद[९] करा, त्यांना घेरून टाका, आणि त्यांच्या पाळतीवर प्रत्येक जागी टपून बसा[१०]. होय, परंतु जर ते तौबा करतील आणि नमाज पढतील आणि जकात देतील, तर तुम्ही त्यांच्या वाटा मोकळ्या सोडा[११]. खचितच् अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ⑤

१) सू.तौबा वजह तसमियाह : याची भाष्यकाराकडून अनेक नांवे सांगण्यात येतात; परंतु जास्त प्रसिद्ध दोन आहेत. एक तौबा, यासाठी की यात अनेक ईमानवाल्यांची तौबा कबूल होण्याचा उल्लेख आहे. दुसरे नाव बराअत आहे. यासाठी की, यात मुशरिकापासून तटस्थतेची सर्व साधारण घोषणा आहे. हा कुरआन मजीदचा एकुलता एक अध्याय आहे, ज्याच्या सुरवातीमध्ये, ''बिस्मिल्लाह् हिर्रहमान् निर्रहिम्,'' नाही. याची पण अनेक कारणे, भाष्यांच्या पुस्तकांत नमूद करण्यात आली आहेत. परंतु जास्त बरोबर ही गोष्ट वाटते की, सू.अन्फाल आणि सू.तौबा, या दोघांच्या विषयात, मोठी समानता आढळून येते. हा अध्याय जणू सू.अन्फालचा उत्तरार्ध (शेवटचा राहिलेला भाग) आहे. म्हणूनच रसूलुल्लाह ﷺ नी, याच्या सुरवातीला बिस्मिल्लाह् मिळवली नाही. आणि आपल्या ﷺ च्या अनुकरणात सहाबा कराम ﷺ नी सुद्धा यात बिस्मिल्लाह् लिहिली नाही. हा सात मोठ्या अध्यायात, सातवा मोठा अध्याय आहे. ज्यांना ''सबए तेवाल'' म्हणण्यात येते. तथापि जर कोणी मनुष्य, सू.तौबापासूनच कुरआनाचे वाचन सुरू करीत असेल, तर तो बिस्मिल्लाह पढू शकतो.

२) मक्केच्या विजयानंतर, ९ हिजरीमध्ये रसूलुल्लाह ﷺ नी ह. अबुबकर सिद्दीक رضي الله عنه ह.अली رضي الله عنه आणि दुसऱ्या सहाबांना, कुरआन करीमचे हे महावाक्य आणि हा आदेश देऊन पाठविले की, त्यांनी मक्केमध्ये याची सर्वसाधारण घोषणा करून टाकावी. त्यांनी आपल्या ﷺ च्या आज्ञेप्रमाणे घोषणा केली की, कोणी मनुष्य बैतुल्लाहचा नग्न होऊन तवाफ करणार नाही; किंबहुना; येत्या वर्षापासून कोण्याही मुश्‌रिकाला बैतुल्लाहच्या हजची परवानगी राहणार नाही. (स. बुखारी व स. मुस्लिम)

३) ही तटस्थतेची घोषणा त्या मुशरिकांसाठी होती, ज्यांच्याशी कुठलाही अमर्यादित करारमदार होता किंवा चार महिन्यांपेक्षा कमीचा होता किंवा ज्यांच्याशी चार महिनेपेक्षा जास्तचा, एका खास मुदतीपर्यंतचा करारमदार होता.

परंतु त्यांच्याकडून करारपालनाची व्यवस्था नव्हती. या सर्वांना चार महिनेपर्यंत मक्केत रहाण्याची परवानगी देऊन देण्यांत आली. याचा अर्थ हा होता की, जर मुदतीमध्ये ते इस्लाम कबुल करून घेतील, तर त्यांना येथे रहाण्याची परवानगी राहील; नाहीतर त्यांना आवश्यक होईल की, त्यांनी चार महिन्यानंतर अरबी द्विपकल्पाच्या बाहेर निघून जावे. जर दोन्ही प्रकारात ते कुठलीही पद्धत अंगिकारणार नाहीत, तर ते युद्ध करण्यास योग्य काफिर म्हणून गणले जातील. ज्यांच्याशी युद्ध करणे, मुसलमानांना आवश्यक राहील की, अरब द्विपकल्प कुफ्र आणि शिर्कच्या अंध:कारापासून स्वच्छ होऊन जावा.

४) म्हणजे ही सवलत यासाठी दिली जात नाही, की तुर्त तुमच्या विरूद्ध कारवाई शक्य नाही; किंबहुना याचा उद्देश फक्त तुमचे भले आणि चांगले चिंतणे आहे. कारण की जो तौबा करून मुसलमान होऊ इच्छेल, आणि मुसलमान होऊन जाईल, नाही तर लक्षांत ठेवा की, तुमच्या बाबतीत अल्लाहचे जे प्रारब्ध आणि मर्जी आहे, त्याला तुम्ही टाळूशकत नाहीत. आणि अल्लाहकडून लादलेली फजिती आणि अपमानापासून तुम्ही वाचू शकत नाही.

५) सहीहैन (बुखारी व मुस्लीम) आणि दुसऱ्या सहीह हदीशींनी सिद्ध आहे की, मोठ्या हजच्या दिवसाने अभिप्रेत कुरबानीचा दिवस (१० जुलहिज्जा) चा दिवस आहे. (बुखारी, मुस्लीम व तिर्मिझी) याच दिवशी मिनामध्ये, मुश्रिकांपासून अलिप्ततेची घोषणा देण्यात आली. १० जुलहिज्जाला, मोठ्या हजचा दिवस यासाठी म्हणण्यात आले की, या दिवशी हजचे सर्वांत जास्त आणि महत्त्वाची अंगे (मनासिक) अदा करण्यात येतात. आणि लोक उमऱ्याला छोटा हज म्हणत असे. म्हणून उमऱ्यांपासून वेगळे करण्यासाठी हजला मोठे हज म्हटले गेले. लोकांत जे हे प्रसिद्ध आहे की, जो हज शुक्रवारच्या दिवशी येईल, तो हज्जे अकबर (मोठा हज) आहे, ही खरी गोष्ट नाही.

६) हा मुश्रिकीनचा चौथा प्रकार आहे. त्यांच्याशी जेवढ्या मुदतीचा करार होता, तेवढ्या मुदतीपर्यंत त्यांना रहाण्याची परवानगी देऊन देण्यात आली. कारण की, त्यांनी कराराचे पालन केले. आणि कराराच्या विरूद्ध काहीच हालचाल केली नाही. म्हणून मुसलमानांना सुद्धा या कराराचे पालन करण्याला आवश्यक ठरविण्यात आले.

७) या आदरणीय महिन्यांनी काय अभिप्रेत आहे? याच्यात मतभेद आहेत. एक मत तर असे आहे की, याच्याने अभिप्रेत तेच चार महिने आहेत, जे आदरणीय आहेत. म्हणजे रज्जब, जुल्कादा, जुलहिज्जा व मोहर्रम आणि अलिप्ततेची घोषणा १० जुलहिज्जाला केली गेली. या अनुषंगाने जणू त्यांना, घोषणेनंतर ५० दिवसांचा अवकाश दिला गेला. कारण की, सन्माननीय महिने निघून गेल्यावर, मुश्रिकीनला पकडण्याची आणि ठार करण्याची परवानगी देऊन देण्यांत आली. परंतु इमाम इब्ने कसीरने म्हटले आहे. येथे सन्माननीय महिन्यांनी अभिप्रेत सन्माननीय महिने नाही. किंबहुना १० जुलहिज्जापासून १० रबीउस्सानी पर्यंतचे चार महिने अभिप्रेत आहेत. त्यांना सन्माननीय महिने यासाठी म्हटले गेले आहे की, अलिप्ततेच्या घोषणेच्या अनुषंगाने या चार महिन्यांत, त्या मुशरिकीन बरोबर लढण्यास, आणि त्यांच्या विरूद्ध कुठलेही पाऊल उचलण्याची परवानगी नव्हती. अलिप्ततेच्या घोषणेच्या अनुषंगाने, हा खुलासा बरोबर वाटतो. वल्लाह् अअलम् बिस्सवाब!

८) काही भाष्यकारांनी या आदेशाला सर्व साधारण ठरवले आहे; म्हणजे हरमच्या बाहेर किंवा हरममध्ये, जेथेही पावाल, ठार करा. आणि काही भाष्यकारांनी, ''सन्माननीय मशिदीच्या जवळ, त्यांच्याशी लढू नका. येथपावेतो की ते स्वत: तुमच्याशी लढतील, तर तुम्हालापण त्यांच्याशी लढण्याची परवानगी आहे.'' (सू. बकर: - १९१) या महावाक्याने मर्यादित केले आहे आणि फक्त हरमच्या हद्दीच्या बाहेर हिल्ल मध्ये ठार करण्याची परवानगी दिली आहे. (इब्ने कसीर)

९) म्हणजे त्यांना कैदी करून घ्या, किंवा ठार मारा.

१०) म्हणजे या गोष्टीला पुरेसे समजू नका, की जर ते तुम्हास कोठे भेटतील, तर तुम्ही कारवाई कराल; परंतु जेथे जेथे त्यांच्या चार भिंती, किल्ले आणि आश्रयस्थाने आहेत, तेथे तेथे त्यांच्यावर टपून बसा, येथपर्यंत की, तुमच्या परवानगीशिवाय, त्यांना हालचाल करणेसुद्धाशक्य होऊ नये.

११) म्हणजे कोणतीही कारवाई त्यांच्या विरोधांत केली जाऊ नये; कारण की, ते मुसलमान होऊन गेले आहेत. जणू इस्लाम कबूल केल्यानंतर, नमाज पढणे आणि जकात अदा करणे यांची काळजी घेतली जावी. जर कोणी मनुष्य यांतून कोण्या एकाला पण तर्क करेल, तर तो मुसलमान समजला जाणार नाही. ज्या प्रमाणे ह.अबुबकर सिद्दीक ﷺ नी जकात न देणाऱ्या विरूद्ध याच महावाक्याचा आधार घेत जिहाद केले. आणि म्हटले, ''अल्लाहची शपथ ! मी त्या लोकांशी जरूर लढेन, जे नमाज आणि जकात मध्ये फरक करतील.'' (स. बुखारी व स. मुस्लीम) म्हणजे नमाज तर पढतील, पण जकात देण्यापासून तोंड फिरवतील.

وَإِنْ أَحَدٌ مِّنَ الْمُشْرِكِينَ اسْتَجَارَكَ فَأَجِرْهُ حَتَّىٰ
يَسْمَعَ كَلَامَ اللَّهِ ثُمَّ أَبْلِغْهُ مَأْمَنَهُ ۚ ذَٰلِكَ بِأَنَّهُمْ
قَوْمٌ لَّا يَعْلَمُونَ ﴿٦﴾

**आणि जर मुश्‌रिकामधून कोणी आपल्याजवळ आश्रय मागेल, तर आप त्यांना आश्रय देऊन दे. येथ पावेतो की ते अल्लाहची वाणी ऐकून घेतील. मग त्याला मग त्याच्या अभय स्थानापर्यंत पोहचवून[१] दे. हे यासाठी की, हे लोक अज्ञानी आहेत[२]. ६**

كَيْفَ يَكُونُ لِلْمُشْرِكِينَ عَهْدٌ عِندَ اللَّهِ وَعِندَ
رَسُولِهِ إِلَّا الَّذِينَ عَاهَدتُّمْ عِندَ الْمَسْجِدِ الْحَرَامِ ۖ
فَمَا اسْتَقَامُوا لَكُمْ فَاسْتَقِيمُوا لَهُمْ ۚ إِنَّ اللَّهَ يُحِبُّ
الْمُتَّقِينَ ﴿٧﴾

**मुशरिकांचा करार, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराजवळ कसा राहूशकतो? त्यांच्या शिवाय, ज्यांच्याशी तुम्ही करारमदार मसजिदे हराम जवळ केला आहे[३]. जोपर्यंत ते लोक तुमच्याशी करार पालन करतील; तुम्ही सुद्धा त्यांच्याशी प्रामाणिकपणे वागा. अल्लाहतआला ईशभय बाळगाणाऱ्यांशी प्रीती राखतो[४] ७**

كَيْفَ وَإِن يَظْهَرُوا عَلَيْكُمْ لَا يَرْقُبُوا فِيكُمْ
إِلًّا وَلَا ذِمَّةً ۚ يُرْضُونَكُم بِأَفْوَاهِهِمْ وَتَأْبَىٰ
قُلُوبُهُمْ وَأَكْثَرُهُمْ فَاسِقُونَ ﴿٨﴾

**त्यांच्या वचनांचा काय भरोसा, तुमच्यावर जर त्यांचे वर्चस्व होऊन जाईल, तर न हे नाते संबंधाचा विचार करतील, न करारमदाराचा[५]; आपल्या तोंडाने तर ते तुम्हास खूष करून टाकता, परंतु त्यांची अंत:करणे मान्य करीत नाही. यांच्यातून बहुतेक तर आज्ञाभंजक आहेत ८**

اشْتَرَوْا بِآيَاتِ اللَّهِ ثَمَنًا قَلِيلًا فَصَدُّوا عَن
سَبِيلِهِ ۚ إِنَّهُمْ سَاءَ مَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿٩﴾

**त्यांनी अल्लाहच्या महावाक्यांना फारच अल्प किंमतीत विकून टाकले. आणि त्याच्या मार्गापासून प्रतिबंध केला. फार वाईट आहे, जे हे करीत आहेत. ९**

لَا يَرْقُبُونَ فِي مُؤْمِنٍ إِلًّا وَلَا ذِمَّةً ۚ وَأُولَٰئِكَ
هُمُ الْمُعْتَدُونَ ﴿١٠﴾

**हे तर कोण्या मुसलमानाच्या बाबतीत, कोण्या नातेसंबंधाची किंवा कराराची पर्वा करीत नाही; हे आहेतच मर्यादेच्या बाहेर निघून जाणारे[६] १०**

१) या महावाक्यात चर्चित युद्ध करणाऱ्या काफिरांच्या बाबतीत एक सवलत देण्यात आली आहे, की जर कोणी काफिर, तुमचा आश्रय मागेल, तर त्याला आश्रय देऊन द्या. म्हणजे त्याला आपल्या संरक्षणात ठेवा; कारण की कोणी मुसलमान त्याला ठार करूशकू नये. आणि यासाठी की त्याला अल्लाहच्या गोष्टी ऐकण्याला, आणि इस्लाम समजण्याची संधी मिळावी. शक्य आहे, अशा प्रकारे त्याला तौबा करण्याची आणि इस्लाम कबूल करण्याची, सुबुद्धी मिळून जावी. परंतु जर तो अल्लाहची वाणी एकल्यावर सुद्धा मुसलमान होत नाही. तर त्याला त्याच्या निर्भय स्थानापर्यंत पोहचवून द्या. अर्थ असा की, संरक्षणाची जबाबदारी शेवटपर्यंत करावयाची आहे, जोपर्यंत तो आपल्या निर्भय स्थानापर्यंत चांगल्या प्रकारे परत पोहचून जात नाही. त्याच्या प्राणाचे संरक्षण ही तुमची जबाबदारी आहे. यांच्यात वचनाचे पालन करण्याची कडक ताकीद आहे.

२) म्हणजे आश्रय मागणाऱ्यांना, आश्रय देण्याची सवलत यासाठी देण्यात आली आहे की, हे अजाण लोक आहेत; शक्य आहे की, अल्लाह व रसूलच्या गोष्टी त्यांना समजाव्या; आणि मुसलमानांचे चारित्र्य आणि कर्तृत्व, त्यांनी पहावे; तर त्यांनी इस्लामच्या सत्य होण्याला मान्य करावे. आणि इस्लाम कबूल करून परलोकांतील शिक्षेपासून वाचून जावे. ज्याप्रमाणे हुदैबियाच्या तहानंतर, पुष्कळसे काफिर संरक्षणाची मागणी करून, मदीनेला येत जात राहिले. तर त्यांना मुसलमानांचे चारित्र्य आणि कर्तृत्व, डोळ्यांनी पाहून, इस्लाम समजण्यांत मोठी मदत मिळाली; आणि पुष्कळसे लोक मुसलमान होऊन गेले.

३) हे चौकशी करणे, वगळण्याच्या दृष्टीकोनातून आहे. म्हणजे ज्या मुशरिकांबरोबर तुमचा करार आहे, त्यांच्याशिवाय आताकोणाशी करार बाकी राहिला नाही.

४) म्हणजे कराराचे पालन, अल्लाहजवळ फार आवडते काम आहे. म्हणून व्यवहारात फार जपले पाहिजे.

५) 'कैफ' पुन्हा ताकीद म्हणून नाकारण्याच्या स्वरूपांत आहे. 'इल्ल' चा अर्थ नाते संबंध, आणि 'जिम्मा' चा अर्थ वचनाचा आहे. म्हणजे या मुशरिकीनच्या तोंडी गोष्टीचा काय भरोसा? जेव्हा की यांची ही स्थिती आहे की, जर हे तुमच्यावर प्रबळ होऊन जातील, तर कोण्या नाते संबंधाचा आणि वचनाचा विचार करणार नाही. काही भाष्यकारांजवळ, पहिला 'कैफ' मुशरिकीनसाठी आहे. आणि दुसऱ्याने यहूदी अभिप्रेत आहेत. कारण की त्यांचे वैशिष्ट्य वर्णन करण्यात आले आहे की, ते अल्लाहच्या महावाक्यांना कमी किंमतीत विकून टाकतात. आणि ही चाल यहूद्यांचीच राहिली आहे.

६) वारंवार स्पष्टीकरणाचा उद्देश्य, मुश्‌रिकीन आणि यहूद्यांचे इस्लाम शत्रुत्व आणि त्यांच्या अंत:करणात लपलेल्या वैरभावाच्या भावनेला जाहीर करून देणे आहे.

فَاِنۡ تَابُوۡا وَ اَقَامُوا الصَّلٰوةَ وَاٰتَوُا الزَّكٰوةَ فَاِخۡوَانُكُمۡ فِى الدِّيۡنِ‌ؕ وَنُفَصِّلُ الۡاٰيٰتِ لِقَوۡمٍ يَّعۡلَمُوۡنَ ﴿۱۱﴾

आतासुद्धा ते तौबा करून घेतील, आणि नमाज पढतील, आणि जकात देत राहतील; तर ते तुमचे धर्मबंधू आहेत[१]. आम्ही तर जाणकारांसाठी आमची महावाक्ये, अगदी स्पष्ट स्पष्ट वर्णन करीत आहोत. (११)

وَاِنۡ نَّكَثُوۡۤا اَيۡمَانَهُمۡ مِّنۡۢ بَعۡدِ عَهۡدِهِمۡ وَطَعَنُوۡا فِىۡ دِيۡـنِكُمۡ فَقَاتِلُوۡۤا اَٮِٕمَّةَ الۡـكُفۡرِ‌ۙ اِنَّهُمۡ لَاۤ اَيۡمَانَ لَهُمۡ لَعَلَّهُمۡ يَنۡتَهُوۡنَ ﴿۱۲﴾

जर हे लोक करारमदारनंतर सुद्धाआपल्या शपथांना तोडून टाकतील; आणि तुमच्या धर्माची कुटाळकी करतील, तर तुम्ही सुद्धा त्यांच्या कुफ्रच्या पुढाऱ्यांशी खूप लढा;यांच्या शपथा काहीच (विश्वासास पात्र) नाही; शक्य आहे की, अशाप्रकारे ते पण परावृत्त होतील[२]. (१२)

اَلَا تُقَاتِلُوۡنَ قَوۡمًا نَّكَثُوۡۤا اَيۡمَانَهُمۡ وَهَمُّوۡا بِاِخۡرَاجِ الرَّسُوۡلِ وَهُمۡ بَدَءُوۡكُمۡ اَوَّلَ مَرَّةٍ‌ ؕ اَتَخۡشَوۡنَهُمۡ‌ۚ فَاللّٰهُ اَحَقُّ اَنۡ تَخۡشَوۡهُ اِنۡ كُنۡتُمۡ مُّؤۡمِنِيۡنَ ﴿۱۳﴾

तुम्ही या लोकांशी (सर्व सामर्थ्यानिशी) का म्हणून लढू नये, ज्यांनी[३] आपल्या शपथा तोडून टाकल्या, आणि पैगंबरांना काढून लावण्याचा बेत केला[४]; आणि स्वत: त्यांनीच प्रथम तुमच्याशी कुरापत काढली[५]. काय, तुम्ही त्यांना भितात? अल्लाहच् जास्त हक्कदार आहे की, तुम्ही त्यांचे भय बाळगावे; जर तुम्ही ईमानवाले आहात (१३)

१) एकेश्वरवाद आणि पैगंबरीला मान्य केल्यानंतर, नमाज इस्लामचे सर्वांत मोठे महत्त्वाचे अंग आहे. जो अल्लाहचा हक्क आहे. यांच्यात अल्लाहच्या उपासनेचे वेगवेगळे अंगे आहेत. यांच्यांत हात बांधून उभे राहणे, अर्धनमन (रूकूअ) आणि सजदे आहेत. मागणे आणि विनविण्या आहेत. अल्लाहच्या मोठेपणाचा आणि प्रतापशाली होण्याचा, आणि आपल्या विनम्रतेचे आणि लाचारीचे प्रदर्शन आहे. उपासनेचे हे सर्व स्वरूप आणि प्रकार फक्त अल्लाहसाठीच खास आहेत. नमाजीनंतर दुसरे महत्त्वाचे कर्तव्य, जकात आहे. ज्यात उपासनेबरोबरच सेवकांचे हक्कपण शामील आहेत. जकातीमुळे समाजाचे आणि त्याच्या घराण्याचे गरजू, गरीब व नादार आणि अपंग आणि दरिद्री लोक फायदा उचलतात. याचसाठी हदीसमध्ये सुद्धा ऐकेश्वरवादाच्या साक्षीनंतर, याच गोष्टींना ठळकपणे वर्णन करण्यात आले आहे. नबी करीम ﷺ नी फर्माविले, ''मला हुकूम देण्यात आला आहे की, लोकांशी युद्ध करावे, येथपावेतो की ते या गोष्टीची साक्ष देतील की अल्लाहशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. आणि मुहम्मद ﷺ अल्लाहचे पैगंबर आहेत. आणि नमाज पढावी आणि जकात द्यावी'' (स.बुखारी व स. मुस्लिम) ह.अब्दुल्लाह बिन मसऊद رضي الله عنه चे म्हणणे आहे, ''ज्याने जकात अदा केली नाही, त्याची नमाजपण नाही.'' (स. बुखारी व स. मुस्लिम)

२) 'अयमान' यमीन चे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ शपथेचा आहे. 'अइम्मा' इमाम चे अनेकवचन आहे, अभिप्रेत पुढारी आहेत. अर्थ हा आहे की, जर हे लोक वचन तोडतील, आणि धर्मांत कुटाळकी करतील, तर उघडपणे यांनी शपथा जरी घेतल्या, तरी यांच्या शपथांचा काही भरोसा नाही. कुफ्रच्या या पुढाऱ्यांशी युद्ध करा. शक्य आहे की, अशाप्रकारे हे कुफ्रपासून परावृत्त होतील, याच्याने अहनाफनी आधार घेतला आहे की, जिम्मी (इस्लामी राज्यात रहाणारे मुस्लीमेतर) जर वचनभंग करीत नाही; तथापि इस्लाम धर्मांत कुटाळकी करतो; तर त्याला ठार केले जाऊ नये. कारण की कुरआनाने यांच्याशी युद्ध करण्यासाठी दोन गोष्टीचा उल्लेख केला आहे. म्हणून जोपर्यंत दोन्ही गोष्टी आढळणार नाही, तो युद्धाला पात्र होणार नाही. परंतु इमाम मालिक, ईमान शाफई आणि दुसरे धर्मपंडीत, धर्मांत कुटाळकीला, वचनभंग पण ठरवितात. म्हणून त्यांच्याजवळ याच्यांत दोन्ही गोष्टी येऊन जातात. म्हणून त्या जिम्मीला ठार करणे योग्य आहे (फत्हुल कदीर)

३)अल्लाहतआला मुसलमानांना, जिहादचे प्रोत्साहन देत आहे.

४) याच्याने अभिप्रेत दारून नदवाची ती सल्लामसलत आहे, जिच्यात मक्केच्या सरदारांनी, नबी ﷺ ला हद्दपार करणे, कैद करणे किंवा ठार करण्याच्या संदर्भात विचार विनिमय केला.

५) याच्याने अभिप्रेत एक तर, बद्रच्या युद्धात मुशरिकीने मक्काची चाल आहे; की जे आपल्या व्यापारी काफल्याच्या संरक्षणासाठी गेले. परंतु त्यांनी पाहून घेतले की तो काफला वाचून निघून गेला आहे; तरी सुद्धा ते बद्रच्या मुक्कामी मुसलमानांशी युद्धाची आणि खोड काढण्याचा प्रयत्न करीत राहिले. ज्याच्या परिणामात शेवटी युध्द होऊनच गेले किंवा याच्याने अभिप्रेत बनी बक्र घराण्याची ती मदत आहे, जी कुरैशने त्यांना केली; जेव्हा की त्यांनी रसूलुल्लाह् ﷺ च्या करार झालेले घराणे, 'खुजाआ' वर चढाई केली होती. वास्तविक कुरैशची ही मदत कराराच्या विरूद्ध होती.

قَاتِلُوهُمْ يُعَذِّبْهُمُ اللّٰهُ بِأَيْدِيكُمْ وَيُخْزِهِمْ
وَيَنصُرْكُمْ عَلَيْهِمْ وَيَشْفِ صُدُورَ قَوْمٍ مُّؤْمِنِينَ ﴿١٤﴾

**त्यांच्याशी तुम्ही युद्ध करा, अल्लाहतआला त्यांना तुमच्या करवी शिक्षा देईल. त्यांना फजित आणि अपमानित करीन. तुम्हाला त्यांच्यावर मदत करीन. आणि मुसलमानांचे काळीज थंड करीन (१४)**

وَيُذْهِبْ غَيْظَ قُلُوبِهِمْ ۗ وَيَتُوبُ اللّٰهُ عَلَىٰ مَن
يَشَاءُ ۗ وَاللّٰهُ عَلِيمٌ حَكِيمٌ ﴿١٥﴾

**आणि त्यांच्या मनांतील दु:ख आणि राग दूर करीन[१]. आणि तो ज्याच्याकडे इच्छितो दयेने लक्ष देतो. आणि अल्लाह सर्व ज्ञाता आणि बुद्धीमान आहे. (१५)**

أَمْ حَسِبْتُمْ أَن تُتْرَكُوا وَلَمَّا يَعْلَمِ اللّٰهُ الَّذِينَ
جَاهَدُوا مِنكُمْ وَلَمْ يَتَّخِذُوا مِن دُونِ اللّٰهِ وَلَا
رَسُولِهِ وَلَا الْمُؤْمِنِينَ وَلِيجَةً ۚ وَاللّٰهُ خَبِيرٌ
بِمَا تَعْمَلُونَ ﴿١٦﴾

ع ٢ / ١٠ / ٨

**काय तुम्ही असे समजून बसले आहात की, तुम्ही सोडून दिले जाल[२]? वास्तविक आतापर्यंत अल्लाहने त्यांना पारखले नाही जे धर्मयुद्ध[३] करतील. आणि ज्यांनी अल्लाह व त्याचा पैगंबर आणि मोमिनांशिवाय कोणाला हार्दिक मित्र बनवला नाही[४]. अल्लाह खूप खबरदार आहे, जे काही तुम्ही करीत आहात[५] (१६)**

مَا كَانَ لِلْمُشْرِكِينَ أَن يَعْمُرُوا مَسَاجِدَ اللّٰهِ شَاهِدِينَ
عَلَىٰ أَنفُسِهِم بِالْكُفْرِ ۚ أُولَٰئِكَ حَبِطَتْ أَعْمَالُهُمْ ۖ
وَفِي النَّارِ هُمْ خَالِدُونَ ﴿١٧﴾

**हे अशक्य आहे की, मुश्रिक लोक अल्लाहतआलाच्या मशिदींना आबाद करतील. वास्तविक ते स्वत: आपल्या कुफ्र बद्दल साक्षीदार आहेत[६]. त्यांची कर्मे सर्व अक्रित आहे. आणि ते निरंतर नरकाग्नीतच रहाणारे होते[७] (१७)**

إِنَّمَا يَعْمُرُ مَسَاجِدَ اللّٰهِ مَنْ آمَنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْآخِرِ
وَأَقَامَ الصَّلَاةَ وَآتَى الزَّكَاةَ وَلَمْ يَخْشَ إِلَّا اللّٰهَ
فَعَسَىٰ أُولَٰئِكَ أَن يَكُونُوا مِنَ الْمُهْتَدِينَ ﴿١٨﴾

**अल्लाहच्या मशिदींची शोभा आणि आबादी तर त्यांच्या वाट्याला जाते, जे अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान ठेवतात, नमाज पढतात, जकात देतात, अल्लाहशिवाय कोणाला भीत नाहीत; हेच लोक खचितच् सन्मार्गाला लागून चुकले[८] (१८)**

१) म्हणजे जेव्हा मुसलमान दुर्बल होते, तर हे मुश्रिकीन त्यांच्यावर जुलूम अत्याचार करीत असत. ज्यामुळे मुसलमानांची मने त्यांच्याकडून फार दु:खी आणि जखमी होते. जेव्हा तुमच्या हाताने ते ठार होतील, आणि फजिती आणि अपमान त्यांच्या वाट्याला येईल; तर स्वाभाविक गोष्ट आहे की, जुलुमाने आणि अत्याचाराने पीडित मुसलमानांची काळीजे थंड होतील आणि राग शांत होईल.

२) म्हणजे परीक्षा आणि अजमाविण्याशिवाय.

३) जणू जिहादच्या मार्फत परीक्षा घेतली गेली.

४) 'वलीजा' दाट आणि हार्दिक मित्राला म्हणतात. मुसलमानांना, कारण की अल्लाह व रसूलच्या शत्रुंशी प्रेम करण्याला आणि मैत्रीसंबंध राखण्याला मनाई करण्यात आली होती. म्हणून हीपण अजमाविण्याची एक पद्धत होती. ज्याच्याने खऱ्या ईमानवाल्यांना दुसऱ्यापासून वेगळे करण्यात आले.

५) अर्थ हा आहे की, अल्लाहला तर पूर्वीच प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे. परंतु जिहादची प्रयुक्ती ही आहे की, यामुळे खरे आणि लबाड, आज्ञाधारक आणि आज्ञाभंजक, जाहीर होऊन समोर येऊन जातात. ज्यांना प्रत्येक मनुष्य पाहून आणि ओळखून घेतो.

६) 'मसाजिदुल्लाह' ने अभिप्रेत मस्जिदे हराम आहे. अनेकवचनाचा शब्द यासाठी वापरण्यांत आला की, हा सर्व मशिदींचा किबला आणि केंद्र आहे. किंवा अरबांमध्ये एकासाठी सुद्धाअनेकवचन उपयोग योग्य आहे. अर्थ हा आहे की, अल्लाहचे घर (म्हणजे मसजिदे हराम) ला बांधणे किंवा आबाद करणे, हे ईमानवाल्यांचे काम आहे. आणि त्यांचे नाही, जे कुफ्र आणि शिर्क करतात आणि त्याला मान्य करतात. जसे ते तलबिया मध्ये म्हणत असत, ''लब्बैक ला शरीक लक, इल्ला शरीकन् हुव लक तम्लिकहु व मा मलक'' (स.मुस्लिम बाबुत तलबिया) किंवा याच्याने अभिप्रेत ती मान्यता आहे जो प्रत्येक धर्मवाला करतो की, मी यहूदी खिस्ती, नक्षत्रपुजक किंवा मुशरिक आहे.

७) म्हणजे त्यांची ती कर्मे जी उघडपणे, तर पुण्याची वाटतात, जसे तवाफ, उमरा आणि हाजींची सेवा वगैरे; कारण की ईमानाशिवाय ही कर्मे, अशा वृक्षासारखी आहेत, ज्यांना फळे नाहीत. किंवा त्या फुलांसारखे आहेत ज्यात सुगंध नाही.

८) ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धाआहे, नबी ﷺ नी फरमाविले, ''जेव्हा तुम्ही पाहाल, की एक मनुष्य मशिदीत नियमित येत आहे, तर तुम्ही त्याच्या ईमानची साक्ष द्या.'' (तिर्मिझी तफसीर सू.तौबा) कुरआन करीममध्ये येथे सुद्धा, अल्लाहवर ईमान आणि परलोकांवर ईमानानंतर ज्या कर्मांचा उल्लेख केला गेला आहे, ते नमाज, जकात आणि ईशभय आहेत. ज्यामुळे नमाज,जकात आणि ईशभयाचे महत्त्व स्पष्ट होते.

اَجَعَلْتُمْ سِقَايَةَ الْحَآجِّ وَعِمَارَةَ الْمَسْجِدِ الْحَرَامِ كَمَنْ اٰمَنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ وَجٰهَدَ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ؕ لَا يَسْتَوٗنَ عِنْدَ اللّٰهِ ؕ وَاللّٰهُ لَا يَهْدِى الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ۘ﴿١٩﴾

**काय तुम्ही हाजींना पाणी पाजणे, आणि मस्जिदे हरामची सेवा करणे, त्याच्या बरोबर करून दिले आहे, जो अल्लाहवर आणि शेवटच्या दिवसावर ईमान आणेल, आणि अल्लाहच्या मार्गांत जिहाद करेल; हे अल्लाहजवळ बरोबर नाहीत[१]. आणि अल्लाहतआला अन्यायी लोकांना सरळ मार्ग दाखवित नसतो[२].** ⑲

اَلَّذِيْنَ اٰمَنُوْا وَهَاجَرُوْا وَجٰهَدُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ بِاَمْوَالِهِمْ وَاَنْفُسِهِمْ ۙ اَعْظَمُ دَرَجَةً عِنْدَ اللّٰهِ ؕ وَاُولٰٓئِكَ هُمُ الْفَآئِزُوْنَ ﴿٢٠﴾

**ज्या लोकांनी ईमान आणले, स्वदेश त्याग केला, अल्लाहच्या मार्गांत आपल्या संपत्तीने आणि आपल्या जीवांनी जिहाद केले, ते अल्लाहजवळ फार मोठ्या दर्जाचे आहेत. आणि हेच लोक आपल्या इच्छेत सफल होतील.** ⑳

يُبَشِّرُهُمْ رَبُّهُمْ بِرَحْمَةٍ مِّنْهُ وَرِضْوَانٍ وَّجَنّٰتٍ لَّهُمْ فِيْهَا نَعِيْمٌ مُّقِيْمٌ ۙ﴿٢١﴾

**त्यांना त्यांचा पालनकर्ता खुषखबर देतो, आपल्या दयेची, आणि प्रसन्नतेची, आणि स्वर्गांची, त्यांच्यासाठी तेथे कायमचे सुख आहे.** ㉑

خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ؕ اِنَّ اللّٰهَ عِنْدَهٗٓ اَجْرٌ عَظِيْمٌ ﴿٢٢﴾

**तेथे हे नेहमी रहाणारे आहेत; अल्लाहजवळ खचितच् पुण्याईचे मोठे प्रतिफळ आहे[३].** ㉒

१) मुशरिकीन हाजी लोकांना पाणी पाजण्याला, आणि मस्जिदे हरामच्या देखभालीचे जे काम करीत होते; त्यावर त्यांना फार गर्व होता. आणि याच्या मुकाबल्यात ते ईमान आणि जिहादला, काही महत्त्व देत नसत. ज्याचे पालन मुसलमानात होते. अल्लाहने फर्माविले काय तुम्ही हाजींना पाणी पाजणे आणि मस्जिदे हरामची देखभाल करणे याला, अल्लाहवर ईमान आणि अल्लाहच्या मार्गांत जिहाद, बरोबर समजता? लक्षात ठेवा! हे अल्लाहच्या जवळ बरोबर नाहीत. किंबहुना मुशरिकचे कोठलेही कर्मपण मान्य नाही. मग जरी उघडपणे ते भलाईचे दिसत असेल. जसे की याच्या पूर्वीच्या महावाक्यातील शब्द 'हबितत् अअ्मालुहुम' मध्ये स्पष्ट करून देण्यात आले आहे. काही उल्लेखांमध्ये, याच्या अवतरणाची कारणे, मुसलमानांच्या आपसातील संभाषणाला दाखविण्यात आले आहे की, एके दिवशी मिम्बरे नबवीजवळ, काही मुसलमान जमा होते. त्यांच्यातून एकाने म्हटले की, इस्लाम आणल्यानंतर, माझेजवळ सर्वांत मोठे कर्म हाजींना पाणी पाजणे आहे. दुसऱ्याने म्हटले मस्जिदे हरामला आबाद करणे आहे. तिसऱ्याने म्हटले किंबहुना, अल्लाहच्या मार्गांत जिहाद, सर्व कर्मांत उत्तम आहे; जे तुम्ही वर्णन केले आहेत. ह.उमर ﵁ नी जेव्हा त्यांना आपसांत चर्चा करतांना ऐकले तेव्हा त्यांना दटाविले, आणि सांगितले की, मिम्बरे रसूल ﷺ जवळ आवाज उंच करून बोलू नका. हा शुक्रवारचा दिवस होता. हदीसचे रावी ह.नोअमान बिन बशीर ﵁ म्हणतात की मी जुमआ नंतर, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सेवेत हजर झालो आणि आपल्या आपसातील बातचितचा उल्लेख केला; ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (स.मुस्लिम) ज्याच्यात जणू हे स्पष्ट करून देण्यात आले की, अल्लाहवर ईमान, परलोकांवर ईमान, आणि अल्लाहच्या मार्गांत जिहाद, सगळ्यांत जास्त महत्वाचे आणि श्रेष्ठ कर्म आहेत. संभाषणाच्या हवाल्याने तर, मूळ महत्त्व आणि श्रेष्ठत्व तर जिहादचे वर्णन करावयाचे होते, परंतु अल्लाहवर ईमानाशिवाय, कोणतेही कर्म मान्य होत नाही. म्हणून याला प्रथम वर्णन करण्यात आले. तथापि याच्याने हे माहित झाले की, अल्लाहच्या मार्गांत जिहादपेक्षा कोणतेही कर्म मोठे नाही. दुसरे हे माहित झाले की, याच्या अवतरणाची कारणे, मुशरिकीनच्या वाईट विचार शिवाय, स्वत: मुसलमानांच्यापण, आपल्या आपल्या बुद्धीप्रमाणे काही कर्मांना काही कर्मांवर महत्त्व देणे होते. जेव्हा की हे काम अल्लाहचे आहे आणि ईमानवाल्यांचे नाही. ईमानवाल्यांचे काम तर प्रत्येक त्या गोष्टीवर अमल करणे आहे; जे अल्लाह व रसूलकडून त्यांना सांगण्यात येईल.

२) म्हणजे हे लोक पाहिजेत तसे दावे करू द्यात, वास्तविक जालीम आहेत, म्हणजे मुशरिक आहेत. यासाठी की शिर्क हाच एक मोठा जुलूम आहे. या जुलुमामुळे ते अल्लाहकडून हिदायत मिळण्याला वंचित् आहेत. म्हणून त्यांच्यात आणि मुसलमानांत, ज्यांना अल्लाहकडून हिदायत मिळालेली आहे, आपसात काही तुलना नाही.

३) या महावाक्यामध्ये त्या ईमानवाल्यांचे श्रेष्ठत्व वर्णन करण्यात आले, ज्यांनी स्वदेश त्याग केला, आणि आपल्या तन मन धनाने जिहादमध्ये भाग घेतला. सांगितले गेले की, अल्लाहजवळ त्यांचा दर्जा सर्वांत उंच आहे. हेच अल्लाहची दया, प्रसन्नता आणि नित्याच्या सुखाला पात्र आहेत. ते नाहीत जे आपल्या तोंडाने आपली स्तुती करतात; आणि आपल्या वाडवडीलांच्या चालीरीतीला, अल्लाहवर ईमान ठेवण्याच्या तुलनेत, प्रिय ठेवतात.

يَـٰٓأَيُّهَا ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ لَا تَتَّخِذُوٓا۟ ءَابَآءَكُمْ وَإِخْوَٰنَكُمْ أَوْلِيَآءَ إِنِ ٱسْتَحَبُّوا۟ ٱلْكُفْرَ عَلَى ٱلْإِيمَـٰنِ ۚ وَمَن يَتَوَلَّهُم مِّنكُمْ فَأُو۟لَـٰٓئِكَ هُمُ ٱلظَّـٰلِمُونَ ﴿٢٣﴾

**हे ईमानवाल्यांनो! आपल्या बापांना आणि आपल्या भावांना, मित्र बनवू नका; जर ते कुफ्रला इस्लामपेक्षा जास्त प्रिय ठेवीत असतील. तुमच्यातून जो पण त्यांच्याशी प्रेम करेल, तो पूर्ण गुन्हेगार जालीमआहे[१]. (२३)**

قُلْ إِن كَانَ ءَابَآؤُكُمْ وَأَبْنَآؤُكُمْ وَإِخْوَٰنُكُمْ وَأَزْوَٰجُكُمْ وَعَشِيرَتُكُمْ وَأَمْوَٰلٌ ٱقْتَرَفْتُمُوهَا وَتِجَـٰرَةٌ تَخْشَوْنَ كَسَادَهَا وَمَسَـٰكِنُ تَرْضَوْنَهَآ أَحَبَّ إِلَيْكُم مِّنَ ٱللَّهِ وَرَسُولِهِۦ وَجِهَادٍ فِى سَبِيلِهِۦ فَتَرَبَّصُوا۟ حَتَّىٰ يَأْتِىَ ٱللَّهُ بِأَمْرِهِۦ ۗ وَٱللَّهُ لَا يَهْدِى ٱلْقَوْمَ ٱلْفَـٰسِقِينَ ﴿٢٤﴾

**आपण सांगून टाका की, जर तुमचे वडील, आणि तुमचे मुलगे, आणि तुमचे भाऊ आणि तुमच्या पत्न्या, आणि तुमची कुटुंबे आणि तुम्ही कमवलेली संपत्ती, आणि तो व्यापार ज्याच्या कमी होण्याला तुम्ही भीतात, आणि ती घरे, ज्यांना तुम्ही पसंत करतात; जर हे तुम्हास अल्लाहपासून आणि त्याच्या पैगंबरांपासून आणि त्याच्या मार्गातील जिहादपेक्षा पण जास्त प्रिय आहेत, तर तुम्ही अल्लाहच्या हुकूमाने शिक्षा येण्याची वाट पहा. अल्लाहतआला आज्ञाभंजकांना हिदायत देत नसतो[२]. (२४)**

१) हा तोच विषय आहे जो कुरआन करीममध्ये अनेक ठिकाणी वर्णन करण्यात आला आहे. (पहावे सू.आले इमरान आ.२८,११८, सू.माइदः आ.५१, सू.मुजादिला आ.२२) येथे जिहाद आणि हिजरतच्या विषयासंबंधात, (कारण की) याचे महत्त्व स्पष्ट आहे, म्हणून याला येथे सुद्धा वर्णन करण्यात आले; म्हणजे जिहाद आणि हिजरतमध्ये, तुमच्याकरीता, तुमचे बाप आणि भाऊ यांचे प्रेम आडवे येऊ नये. कारण की ते आतापर्यंत काफिर आहेत, तर ते तुमचे मित्र होऊच शकत नाही. किंबहुना ते तर तुमचे शत्रू आहेत. जर तुम्ही त्यांच्याशी प्रेमाचा संबंध ठेवाल, तर लक्षात ठेवा, तुम्हीपण जालीम ठरविले जाल.

२) या महावाक्यात पण मागे येऊन गेलेल्या विषयाला मोठ्या ताकीद देण्याच्या स्वरूपात वर्णन करण्यात आले आहे. 'अशीरतन्' अर्थात ते जवळचे नातेवाईक ज्यांच्या बरोबर मनुष्य जीवनाचे रात्रंदिवस घालवितो. म्हणजे कुटुंब, घराणे. इकतराफ, कमाईच्या अर्थात येतो. व्यापार, मालाच्या खरेदी विक्रीला म्हणतात. ज्याच्याने नफा कमाविणे हा उद्देश असावा. कसाद, मंदिला म्हणतात. म्हणजे विक्रीचा सामान तर असावा पण खरीददार नसावेत. किंवा वस्तुचा वेळ निघून गेलेला असावा; ज्यामुळे लोकांना याची आवश्यकता न रहावी. दोन्ही स्वरूपे मंदिची आहेत. मसाकीन ने अभिप्रेत ती घरे आहेत, ज्यांना मनुष्य ऋतुंच्या तिव्रतेपासून वाचण्यासाठी, प्रतिष्ठितपणे रहाण्या सवरण्यासाठी, आणि आपल्या बाल बच्च्यांच्या संरक्षणासाठी बांधतो. या सर्व वस्तूआपआपल्या ठिकाणी आवश्यक आहेत. आणि त्यांचे महत्त्व आणि फायदा, पण टाळता येण्यासारखा नाही. आणि माणसाच्या मनात त्यांचे प्रेम पण स्वाभाविक आहे. (जे निंदनीय नाही.) परंतु जर यांचे प्रेम अल्लाह व रसूलच्या प्रेमापेक्षा जास्त आणि अल्लाहच्या मार्गात जिहाद करण्याला प्रतिबंधित करेल; तर ही गोष्ट अल्लाहला अत्यंत नावडती आणि त्याच्या अप्रसन्नतेला कारणीभूत आहे. आणि हे ते आज्ञाभंजन आहे. ज्यामुळे मनुष्य अल्लाहच्या हिदायतपासून वंचित रहातो. जसे की शेवटच्या भिवविण्याच्या शब्दांनी स्पष्ट आहे. हदीशीमध्ये, नबी ﷺ नी, पण या विषयाला स्पष्टपणे वर्णन केले आहे. उदाहरणार्थ एका प्रसंगी ह.उमर رضي الله عنه नी म्हटले ''या रसूलुल्लाह! मला आपण आपल्या जिवाशिवाय, प्रत्येक गोष्टीहून जास्त प्रिय आहोत.'' आपण ﷺ नी फर्माविले, ''जो पर्यंत मी त्याच्या जिवापेक्षा पण जास्त प्रिय होऊन जाणार नाही, तोपर्यंत तो ईमानवाला नाही.'' ह.उमर رضي الله عنه नी म्हटले, ''तर मग वल्लाह! आता आपण मला, आपल्या जिवापेक्षासुद्धा जास्त प्रिय आहोत.'' आपण ﷺ नी फर्माविले ''हे उमर, आता तुम्ही ईमानवाले आहात'' (स.बुखारी) एका दुसऱ्या रिवायतीत नबी ﷺ नी फर्माविले, ''शपथ आहे त्या व्यक्तीमत्वाची! ज्याच्या हातात माझे प्राण आहेत, तुमच्यात कोणीही मनुष्य त्यावेळेपर्यंत ईमानवाला नाही; जोपर्यंत मी त्याला, त्याच्या वडिलाहून, त्याच्या संततीहून, आणि सर्व लोकांहून जास्त, प्रिय होऊन जाणार नाही.'' (स.बुखारी व स. मुस्लिम) आणखी एका हदीसमध्ये जिहादचे महत्त्व वर्णन करताना म्हटले आहे, ''जेव्हा तुम्ही ''बयइ ईना'' (कोणाला ठराविक मुदतीसाठी, वस्तूउधार देऊन, मग त्याच्या पासून कमी किंमतीत खरेदी करून घेणे) अंगिकार करून घ्याल, आणि गाईच्या शेपट्या धरून, शेतीबाडीवर प्रसन्न राजी होऊन जाल, आणि जिहादला सोडून द्याल, तर अल्लाहतआला तुमच्यावर अशी फजिती टाकून देईल, त्यांतून तुम्ही त्यावेळेपर्यंत निघूशकणार नाही; जोपर्यंत आपल्या धर्माकडे वळणार नाही. (अबुदाऊद, मुसनद महमद)

لَقَدْ نَصَرَكُمُ اللّٰهُ فِىْ مَوَاطِنَ كَثِيْرَةٍ ۙ وَّيَوْمَ حُنَيْنٍ ۙ اِذْ اَعْجَبَتْكُمْ كَثْرَتُكُمْ فَلَمْ تُغْنِ عَنْكُمْ شَيْـًٔا وَّضَاقَتْ عَلَيْكُمُ الْاَرْضُ بِمَا رَحُبَتْ ثُمَّ وَلَّيْتُمْ مُّدْبِرِيْنَ ۚ ﴿٢٥﴾

खचितच् अल्लाहतआलाने बऱ्याचशा रणांगणात तुम्हास विजय (मिळवून) दिला आहे; आणि हुनैनच्या युद्धाच्या दिवशीपण, जेव्हा तुम्हास आपल्या अधिकतेवर गर्व होऊन गेला होता. परंतु याने तुम्हास काही फायदा दिला नाही; किंबहुना जमीन विस्तृत्व असून सुद्धा, तुमच्यासाठी संकुचित होऊन गेली; मग तुम्ही पाठ फिरवून, फिरले, (२५)

ثُمَّ اَنْزَلَ اللّٰهُ سَكِيْنَتَهٗ عَلٰى رَسُوْلِهٖ وَعَلَى الْمُؤْمِنِيْنَ وَاَنْزَلَ جُنُوْدًا لَّمْ تَرَوْهَا ۚ وَعَذَّبَ الَّذِيْنَ كَفَرُوْا ؕ وَذٰلِكَ جَزَآءُ الْكٰفِرِيْنَ ﴿٢٦﴾

मग अल्लाहने आपल्याकडून, मन:शांती आपल्या पैगंबरावर आणि मोमिनांवर उतारली; आणि आपले ते सैन्य पाठविले, ज्यांना तुम्ही पाहत नव्हता. आणि काफिरांना पूर्ण शिक्षा दिली. या काफिरांचा हाच बदला होता. (२६)

ثُمَّ يَتُوْبُ اللّٰهُ مِنْۢ بَعْدِ ذٰلِكَ عَلٰى مَنْ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٢٧﴾

मग याच्यानंतरसुद्धा अल्लाहतआला ज्याच्याकडे इच्छिल त्याच्याकडे दयेने बघेन[१]; आणि अल्लाहच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (२७)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اِنَّمَا الْمُشْرِكُوْنَ نَجَسٌ فَلَا يَقْرَبُوا الْمَسْجِدَ الْحَرَامَ بَعْدَ عَامِهِمْ هٰذَا ۚ وَاِنْ خِفْتُمْ عَيْلَةً فَسَوْفَ يُغْنِيْكُمُ اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖۤ اِنْ شَآءَ ؕ اِنَّ اللّٰهَ عَلِيْمٌ حَكِيْمٌ ﴿٢٨﴾

हे ईमानवाल्यांनो! मुशरिक तर बिलकुल गलिच्छ आहेत[२]. त्यांनी या वर्षानंतर मस्जीदे हरामच्या जवळ देखील फिरकू नये[३]; जर तुम्हाला दारिद्र्याचे भय असेल, तर अल्लाह तुम्हाला श्रीमंत करून टाकीन, आपल्या कृपेने, जर तो इच्छील[४]; अल्लाह ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. (२८)

قَاتِلُوا الَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَلَا بِالْيَوْمِ الْاٰخِرِ وَلَا يُحَرِّمُوْنَ مَا حَرَّمَ اللّٰهُ وَرَسُوْلُهٗ وَلَا يَدِيْنُوْنَ دِيْنَ الْحَقِّ مِنَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ حَتّٰى يُعْطُوا الْجِزْيَةَ عَنْ يَّدٍ وَّهُمْ صٰغِرُوْنَ ۠ ﴿٢٩﴾

त्या लोकांशी लढा, जे अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान आणत नाहीत; जे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या, हराम केलेल्या वस्तूंना हराम मानीत नाही न सत्य धर्माला कबूल करतात. यांच्यातून ज्यांना पुस्तक दिले गेले आहे, येथपर्यंत की ते फजित आणि अपमानित होऊन, आपल्या हाताने जिझीया देऊ लागतील[५]. (२९)

وَقَالَتِ الْيَهُوْدُ عُزَيْرُ ۨابْنُ اللّٰهِ وَقَالَتِ النَّصٰرَى الْمَسِيْحُ ابْنُ اللّٰهِ ؕ ذٰلِكَ قَوْلُهُمْ بِاَفْوَاهِهِمْ ۚ يُضَاهِـُٔوْنَ قَوْلَ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ قَبْلُ ؕ قَاتَلَهُمُ اللّٰهُ ۚ اَنّٰى يُؤْفَكُوْنَ ﴿٣٠﴾

यहूदी म्हणतात की उजैर अल्लाहचा मुलगा आहे, आणि खिस्ती म्हणतात की, मसीह अल्लाहचा मुलगा आहे; हे म्हणणे फक्त त्यांच्या तोंडाची गोष्ट आहे. पूर्वीच्या नाकारणाऱ्यांची गोष्टीची नक्कल हे पण करू लागले; अल्लाह त्यांना गारत करो! ते कोठल्या कोठे बहकले चालले जातात (३०)

१) हुनैन, ताएफ आणि मक्केच्या दर्म्यान, एक खोरे आहे. येथे 'हवाजिन' आणि 'सकीफ' रहात असत. ही दोन्ही घराणी बाण चालविण्यात (तीरंदाजीत) सुप्रसिद्ध होती. हे मुसलमानांच्या विरोधात लढण्याची तयारी करीत होते. ज्याचे ज्ञान रसूल ﷺ ला झाले. तेव्हा आपण १२ हजारचे सैन्य घेऊन या कबिल्याशी युद्ध करण्यासाठी हुनैन येथे गेले. हा मक्केच्या विजयाच्या, १८/१९ दिवसानंतर शव्वाल चा प्रसंग आहे. चर्चित कबिल्यांनी पूर्ण तयारी करून ठेवली होती. आणि निरनिराळ्या लपून बसण्याच्या जागावर बाण चालवणाऱ्यांना बसवनू ठेवले होते. इकडे मुसलमानांना असे वाटायला लागले आज कमीत कमी संख्येच्या कारणाने तरी आम्ही पराभूत होणार नाही. म्हणजे अल्लाहच्या मदतीच्या ऐवजी आपल्या विपुल संख्येवर भरोसा जास्त होऊन गेला. अल्लाहतआलाला हा अहंकार आणि असे बोलणे पसंत पडले नाही. परिणामत: जेव्हा हवाजिनच्या तीरंदाजांनी वेगवेगळ्या ठिकाणी लपून बसलेल्या जागांतून मुसलमानांच्या सैन्यावर एकाच वेळी बाण सोडले तेव्हा या कल्पना नसलेल्या आणि अचानक झालेल्या बाणांच्या वर्षावाने मुसलमान, उभे राहूशकले नाही आणि ते पळू लागले. मैदानात फक्त, रसूल ﷺ आणि शंभराच्या जवळपास मुसलमान राहून गेले. आपण ﷺ मुसलमानांना बोलावित होते की, ''हे अल्लाहच्या बंद्यांनो ! माझ्या जवळ या. मी अल्लाहचा पैगंबर आहे.'' कधी हे स्फूर्ती देणारे शेर आणि हे शब्द म्हणत. ''अनन् नबीयु ला कजिब, अना अबनु

अबदिल मुत्तलिब.'' मग आपण ﷺ नी ह.अब्बास ؓ ला (जे खूप मोठ्या आवाजाने बोलणारे होते) हुकूम दिला की, मुसलमानांना गोळा करण्यासाठी आवाज द्या. म्हणून यांचा आवाज ऐकून मुसलमान फारच लज्जित झाले, आणि पुन्हा रणांगणांत येऊन पोहचले. आणि अशा प्रकारे जमून लढले की, अल्लाहने विजय मिळवून दिला. अल्लाहची मदत पण मग अशाप्रकारे मिळाली की, एक तर त्यांच्यावर मन:शांती, अवतरीत करण्यात आली. ज्यामुळे त्यांच्या मनांत शत्रुचे भय नाहिसे होऊन गेले. दुसरे देवदूतांचे अवतरण झाले. या युद्धात मुसलमानांनी, सहा हजार काफिरांना कैदी बनविले (ज्यांना नंतर नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सांगण्यावरून सोडून देण्यात आले.) आणि गनीमतचा खुपच सामान प्राप्त झाला. युद्धानंतर यांचे बरेचसे सरदार मुसलमान झाले. येथे तीन महावाक्यात, अल्लाहतआलाने याचा थोडक्यात उल्लेख केला आहे.

२) मुशरिकांचा गलीच्छ (घाणेरडे, अपवित्र) होण्याचा अर्थ, श्रद्धा आणि कर्मांच्या दृष्टीने, अपवित्र होणे आहे. काहींजवळ मुशरिक उघड आणि आतून दोन्ही प्रकारे गलीच्छ आहेत. कारण की ते पाकसाफ होण्याची, त्याचप्रमाणे पालन करीत नाही, ज्याचा हुकूम धर्मशास्त्राने दिला आहे.

३) हा तोच हुकूम आहे, जो ९ हिजरीत, अलिप्ततेच्या घोषणे बरोबर केला गेला होता. ज्याचे स्पष्टीकरण पहिले येऊन चुकले आहे. ही मनाई, काहींजवळ फक्त मसजिदे हरामसाठी आहे; नाहीतर आवश्यकतेप्रमाणे मुशरिकीन दुसऱ्या मशीदीमध्ये दाखल होऊ शकतात. ज्याप्रमाणे नबी करीम ﷺ नी सुमामा बिन अस्साल ؓ ला, मस्जिदे नबवीच्या खांबाला बांधून ठेवले होते. येथपर्यंत की अल्लाहने त्यांच्या मनांत इस्लामचे आणि नबी ﷺ चे प्रेम टाकून दिले, आणि ते मुसलमान होऊन गेले. या शिवाय बहुतेक विद्वानांजवळ, येथे मसजिदे हरामने अभिप्रेत पूर्ण हरम आहे. म्हणजे हरमच्या हद्दीत, मुशरिकचा प्रवेश मना आहे. काही सहाबांच्या म्हणण्याच्या आधारावर, या हुकमातून जिझिया देणारे स्थानिक लोक आणि नौकर यांना वगळण्यात आले आहे. अशाप्रकारे ह.उमर बिन अ.अजीज رحمه الله नी, याचा आधार घेत, आपल्या सत्तेच्या काळी, यहूदी आणि खिस्त्यांनापण, मुसलमानांच्या मशीदीमध्ये प्रवेशाला, मनाईचा हुकूम जारी केला होता. (इब्ने कसीर)

४) मुशरिकीनच्या मनाईमुळे, काही मुसलमानांच्या मनांत, हा विचार आला की, हजच्या हंगामात जास्त गर्दीमुळे, जो व्यापार होतो, त्यावर परिणाम होईल. अल्लाहतआलाने म्हटले या दारिद्रया (म्हणजे व्यापाराची कमतरता) ने भिण्याची आवश्यकता नाही. अल्लाहतआला लवकरच आपल्या कृपेने तुम्हांस श्रीमंत करून टाकीन. म्हणून विजयामुळे, भरपूर गनीमतची संपत्ती मुसलमानांना मिळाली. आणि मग सर्व अरबस्थान हळूहळू मुसलमान होऊन गेला; आणि हजच्या हंगामात हाजींची रेलचेल पुन्हा अशीच होऊन गेली; ज्याप्रमाणे पूर्वी होती. किंबहुना त्याच्यापेक्षां कितीतरी जास्त होऊन गेली आणि जी नित्य वाढतच आहे.

५) मुशरिकीन बरोबर युध्दाच्या हुकूमानंतर, या महावाक्यांत यहूदी आणि खिस्ती बरोबर युद्धाचा हुकूम दिला जात आहे. (जर ते इस्लाम कबुल करीत नसतील) किंवा मग ते जिझिया देऊन, मुसलमानांच्या अधिपत्याखाली रहाणे, मान्य करतील. जिझिया एक ठराविक रक्कम आहे, जी दरवर्षी अशा गैरमुस्लीमकडून, घेतली जाते. जे कोण्या मुस्लीम राज्यात रहात असतील. याच्या बदल्यात त्यांच्या प्राण आणि संपत्तीचे, तसेच इज्जत व आबरूच्या संरक्षणाची जबाबदारी, इस्लामी राज्याची असते. यहूदी आणि खिस्ती या गोष्टीवर सुद्धा की ते अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर ईमान ठेवत होते, त्यांच्या बाबतीत सांगण्यात आले की, ते अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर ईमान ठेवत नव्हते; याच्याने हे स्पष्ट करून देण्यात आले की, मनुष्य जोपर्यंत अल्लाहवर अशाप्रकारे ईमान ठेवणार नाही, ज्याप्रमाणे अल्लाहने आपल्या पैगंबरांमार्फत सांगितले आहे. तोपावेतो त्याचे अल्लाहवर ईमान, भरोशाच्या लायक नाही; आणि हे पण स्पष्ट आहे की, यांचे अल्लाहवर ईमानाला भरोशालायक नसल्याचे यासाठी ठरविण्यात आले की, यहूदी आणि खिस्त्यांनी, ह. उजैर आणि ह.मसीह अल्लाहचे पुत्र होणे आणि उपास्य होण्याची श्रद्धा बनवून घेतली होती. जसा की, पुढील महावाक्यांत यांच्या या श्रद्धेचा उल्लेख आहे.

اِتَّخَذُوْٓا اَحْبَارَهُمْ وَرُهْبَانَهُمْ اَرْبَابًا مِّنْ دُوْنِ اللّٰهِ
وَالْمَسِيْحَ ابْنَ مَرْيَمَ ۚ وَمَآ اُمِرُوْٓا اِلَّا لِيَعْبُدُوْٓا
اِلٰهًا وَّاحِدًا ۚ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۭ سُبْحٰنَهٗ عَمَّا يُشْرِكُوْنَ ﴿٣١﴾

**या लोकांनी अल्लाहला सोडून आपल्या विद्वानांस आणि सन्याशास, आपला पालनकर्ता बनवले आहे[१]; आणि मर्यमचा पुत्र मसीहला. वास्तविक त्यांना एक एकट्या अल्लाहचीच उपासना करण्याचा हुकूम करण्यात आला होता; ज्याच्या वाचून अन्य कोणी उपास्य नाही; त्यांच्या सरकतदार ठरविण्यापासून, तो पवित्र आहे. (३१)**

يُرِيْدُوْنَ اَنْ يُّطْفِــُٔـوْا نُوْرَ اللّٰهِ بِاَفْوَاهِهِمْ وَيَاْبَى
اللّٰهُ اِلَّآ اَنْ يُّتِمَّ نُوْرَهٗ وَلَوْ كَرِهَ الْكٰفِرُوْنَ ﴿٣٢﴾

**ते इच्छितात की, अल्लाहच्या प्रकाशाला आपल्या तोंडाने विझवून टाकावे. आणि अल्लाहतआलाला हे मंजुर आहे की, हरेक प्रकारे त्याने आपला प्रकाश पूर्ण करून टाकावा मग काफिर जरी नाखुश होवोत[२] (३२)**

هُوَ الَّذِيْٓ اَرْسَلَ رَسُوْلَهٗ بِالْهُدٰى وَدِيْنِ الْحَقِّ
لِيُظْهِرَهٗ عَلَى الدِّيْنِ كُلِّهٖ ۙ وَلَوْ كَرِهَ الْمُشْرِكُوْنَ ﴿٣٣﴾ النصف

**त्यानेच आपल्या पैगंबराला मार्गदर्शन आणि खऱ्या धर्मासह पाठविले आहे. की त्याला आणखी तमाम धर्मावर प्रबळ करून द्यावे[३]. जरी मुशरिकांना कितीही वाईट वाटो (३३)**

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِنَّ كَثِيْرًا مِّنَ الْاَحْبَارِ
وَالرُّهْبَانِ لَيَاْكُلُوْنَ اَمْوَالَ النَّاسِ بِالْبَاطِلِ
وَيَصُدُّوْنَ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ ۭ وَالَّذِيْنَ يَكْنِزُوْنَ
الذَّهَبَ وَالْفِضَّةَ وَلَا يُنْفِقُوْنَهَا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ۙ
فَبَشِّرْهُمْ بِعَذَابٍ اَلِيْمٍ ﴿٣٤﴾

**हे ईमानवाल्यांनो! बहुतेक विद्वान आणि सन्याशी, लोकांचा माल नाहक खाऊन टाकतात; आणि अल्लाहच्या मार्गापासून (लोकांस) अडथळा करतात[४]. आणि जे लोक सोन्या चांदीचे खजीने बाळगतात; आणि अल्लाहच्या मार्गांत खर्च करीत नाहीत; त्यांना दु:खदायक शिक्षेची खुषखबर ऐकवून द्या[५]. (३४)**

يَّوْمَ يُحْمٰى عَلَيْهَا فِيْ نَارِ جَهَنَّمَ فَتُكْوٰى بِهَا
جِبَاهُهُمْ وَجُنُوْبُهُمْ وَظُهُوْرُهُمْ ۭ هٰذَا مَا كَنَزْتُمْ
لِاَنْفُسِكُمْ فَذُوْقُوْا مَا كُنْتُمْ تَكْنِزُوْنَ ﴿٣٥﴾

**ज्या दिवशी या खजिन्यांना, नरकाच्या अग्नीत तापविले जाईल, मग याच्याने त्यांची कपाळे, आणि कुशी, आणि पाठ, डागल्या जातील. (त्यांना सांगण्यात येईल) हे आहे, ज्याला तुम्ही आपल्याकरीता खजिना बनवून ठेवले होते. आता आपल्या खजिन्यांची मजा चाखा (३५)**

اِنَّ عِدَّةَ الشُّهُوْرِ عِنْدَ اللّٰهِ اثْنَا عَشَرَ شَهْرًا فِيْ
كِتٰبِ اللّٰهِ يَوْمَ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ مِنْهَآ
اَرْبَعَةٌ حُرُمٌ ۭ ذٰلِكَ الدِّيْنُ الْقَيِّمُ ڏ فَلَا تَظْلِمُوْا
فِيْهِنَّ اَنْفُسَكُمْ وَقَاتِلُوا الْمُشْرِكِيْنَ كَاۗفَّةً
كَمَا يُقَاتِلُوْنَكُمْ كَاۗفَّةً ۭ وَاعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ مَعَ
الْمُتَّقِيْنَ ﴿٣٦﴾

**महिन्यांची गणती, अल्लाहजवळ, अल्लाहच्या पुस्तकांत, बाराची आहे. त्या दिवसापासूनच, जेव्हापासून आकाश आणि पृथ्वीला, त्याने निर्माण केले आहे. यातून चार सन्माननीय व आदराचे आहेत[६]. सरळ धर्मतर हाच आहे[७]. तुम्ही या महिन्यांत आपल्या जीवावर जुलूम करू नका[८]. आणि तुम्ही सर्व मुशरिकांशी जिहाद करा; जसे की ते तुमच्याशी लढतात[९]. आणि लक्षात ठेवा अल्लाहतआला भिणाऱ्यांच्या बरोबर आहे. (३६)**

१) याचे भाष्य ह.अदी बिन हातिमच्या वर्णन केलेल्या हदीशीने, चांगल्याप्रकारे होऊन जाते. ते म्हणतात की, मी, नबी ﷺ कडून हे महावाक्य ऐकून अर्ज केला की, यहूदी आणि ख्रिस्त्यांनी कधी आपल्या धर्मपंडितांची उपासना केली नाही. मग हे का सांगण्यात आले की, त्यांनी त्यांना आपला पालनकर्ता बनवून घेतले? आपण ﷺ नी फर्माविले की ''हे ठीक आहे की त्यांनी त्यांची उपासना केली नाही. परंतु ही गोष्ट तर आहे ना, की त्यांच्या धर्मपंडितांनी ज्याला हलाल ठरवून दिले त्याला त्यांनी हलाल. आणि ज्या वस्तुला हराम करून दिले, त्याला हरामच समजले. हीच त्यांची उपासना करणे आहे.'' (तिर्मिझी लल्बानी क्र.२४७१) कारण की हराम आणि हलाल करण्याचा अधिकार, फक्त अल्लाहतआलालाच आहे. हाच हक्क, कोणी मनुष्य आणखी कोणासाठी मान्य करतो, तर याचा अर्थ हा आहे की, त्याने त्याला आपला पालनकर्ता बनवून घेतला आहे. या महावाक्यांत वेगवेगळ्या पंथाचे अनुकरण करणाऱ्यांसाठी मोठी तंबीह आहे, ज्यांनी आपआपल्या धर्मशास्त्री, इमामांना गाळून टाकण्याचे आणि निषीद्ध करण्याचे, पद देऊन ठेवले आहे. आणि त्यांच्या कौलाच्या तुलनेत, कुरआन आणि हदीसच्या सुस्पष्ट आदेशांना पण महत्त्व देण्यांस तयार होत नाही. अआजनल्लाहु मिनहू!

२) म्हणजे अल्लाहने रसूल ﷺ ला जे मार्गदर्शन आणि सत्य धर्म घेऊन पाठविले आहे; यहूदी, ख्रिस्ती आणि

मुशरिकीन इच्छितात की, आपल्या लढाई झगड्याने आणि खोटे नाटे ठरवून त्याला संपवून टाकावे. त्यांचे उदाहरण असेच आहे, जसे कोणी मनुष्य सूर्याच्या किरणांना किंवा चंद्राच्या प्रकाशाला आपल्या फुंकरीने विझवून टाकावे. मग, जसे हे अशक्य आहे, त्याचप्रमाणे जो सत्यधर्म अल्लाहने आपल्या पैगंबराला देऊन पाठविले आहे; त्याला संपविणेपण अशक्य आहे. तो सर्व धर्मांवर प्रबळ होऊन राहील. जसे की, पुढील महावाक्यात अल्लाहतआलाने फर्माविले. काफिरचा शब्दकोशीय अर्थ आहे, लपविणारा; म्हणून रात्रीला पण 'काफिर' म्हटले जाते; की ती सर्व वस्तूंना आपल्या अंधारात लपवून घेते. शेतकऱ्याला पण 'काफिर' म्हणतात कारण की, तो धान्याच्या दाण्यांना, जमिनीत लपवून देतो. जणू काफिर पण अल्लाहच्या प्रकाशाला लपवू इच्छितात; किंवा आपल्या मनांत कुफ्र आणि निफाक (दांभिकत्व) आणि मुसलमान आणि इस्लामच्या विरूद्ध द्वेष आणि मत्सर लपविलेले असतात. म्हणून त्यांना काफिर म्हटले जाते.

३) पुरावे आणि प्रमाणे याच्या दृष्टीकोनाने, तर हे प्राबल्य नेहमीचे प्राप्त आहे. तथापि जेव्हापण मुसलमानांनी धर्मावर अंमलबजावणी केली; तर त्यांना ऐहिक प्राबल्य पण प्राप्त झाले. आणि आता सुद्धा मुसलमान आपल्या धर्मावर अंमल करणारे होऊन जातील, तर त्यांचे प्राबल्य नक्कीच आहे. यासाठी की, अल्लाहचा वायदा आहे की, अल्लाहवालेच प्रबळ आणि विजयी होतील. अट हीच आहे की, मुसलमानांनी अल्लाहवाले बनून जावे.

४) 'अहबार' 'हिबरून' चे अनेकवचन आहे. हे अशा माणसाला म्हणण्यात येते जो गोष्टीला सुंदर प्रकारे सादर करण्याची लायकी बाळगत असावा. सुंदर आणि मनाला मोहविण्याऱ्या कपड्यांना, 'सौबून मुहब्बरून' म्हटले जाते. अभिप्रेत यहूद्यांचे धर्मपंडित आहेत. रूहबाना राहिब चे अनेकवचन आहे. जे 'रहबता' पासून बनविण्यात आले आहे. याच्याने अभिप्रेत ख्रिस्त्यांचे धर्मपंडित आहेत. काहींच्याजवळ हे ख्रिस्त्यांतील सूफी आहेत. धर्मपंडितांसाठी त्यांच्याजवळ, 'किस्सीसीईन' चा शब्द आहे. हे दोन्ही एक तर अल्लाहच्या पुस्तकांत हेरफेर आणि बदल करून लोकांच्या इच्छेप्रमाणे मसले दाखवत; आणि अशाप्रकारे लोकांना अल्लाहच्या मार्गापासून अडथळा करीत. दुसरे अशाप्रकारे लोकांकडून संपत्ती उपटत. जो यांच्यासाठी चुकीचा आणि हराम होता. दुर्दैवाने मुसलमानांच्या बहुसंख्य धर्मपंडितांची पण हीच स्थिती आहे. आणि अशाप्रकारे नबी ﷺ च्या भविष्यवाणीला सत्य ठरविणारे आहे. ज्यात आपण ﷺ नी फर्माविले होते. ''तुम्ही मागील उम्मतींच्या चालीरितींचे जरूर अनुकरण करणार'' (स.बुखारी) आणि या बाबतीत पूर्ण हदीसपण आहे.

५) ह.अब्दुल्लाह बिन उमर ﵁ म्हणतात की, हा जकातच्या हुकूमाच्या पूर्वींचा हुकूम आहे. जकातचा हुकूम नाजील झाल्यानंतर, जकातीला अल्लाहतआलाने संपत्तीच्या पवित्र होण्याचे साधन बनवून दिले. म्हणून धर्मपंडित म्हणतात; ज्या संपत्तीतून जकात अदा करून दिली जाईल ती कंज (गुप्तधन) नाही. आणि ज्या संपत्तीतून जकात अदा न केली जाईल ती कंज (खजीना) आहे; ज्यावर ही कुरआनी दटावणी आहे. म्हणून सहीह हदीसमध्ये आहे की, ''जो मनुष्य आपल्या संपत्तीची जकात अदा करीत नाही, कयामतच्या दिवशी त्याच्या संपत्तीला अग्नीच्या पाट्या बनवून दिले जाईल. ज्याच्याने त्याच्या दोन्ही कुशींना, कपाळाला, आणि कमरेला डागले जाईल. हा दिवस पन्नास हजार वर्षांचा असेल; आणि लोकांचे निर्णय होऊन जाईपर्यंत, याची हीच स्थिती राहील. याच्यानंतर स्वर्गांत किंवा नरकात त्याला घेऊन जाण्यात येईल.( स.मुस्लीम)

६) फि किता बिल्लाह ने अभिप्रेत लौहे महफूज म्हणजे अल्लाहचे प्रारब्ध आहे. म्हणजे या जगाच्या सुरवातीपासूनच, अल्लाहतआलाने बारा महिने निश्चित केले आहे. ज्याच्यांत चार आदरणीय आहेत ज्यांत लढाई आणि झगड्याची विशेषकरून मनाई आहे. या गोष्टीला नबी करीम ﷺ नी अशा प्रकारे वर्णन केले आहे की, ''काळ फिरून फिरून परत त्याच अवस्थेवर येऊन पोहचला आहे, ज्या अवस्थेत त्या वेळी होता, जेव्हा अल्लाहतआलाने आकाश व पृथ्वीची निर्मिती केली. वर्ष बारा महिन्यांचे आहे. ज्यांत चार आदरणीय आहेत. तीन एका पाठोपाठ एक, जुलकादा, जुलहिज्जा आणि मुहर्रम. चौथा रजबे मुजर. जो जमादिल आखर आणि शाबानच्या दरम्यान आहे.'' (स.बुखारी क्र.४४०६ व स.मुस्लीम - १३०७)'' काळ या अवस्थेवर येऊन पोहचला आहे.'' चा अर्थ अरबचे मुशरिक महिन्यांत जे मागे सोडत होते किंवा पुढे करीत होते, ज्याचा तपशील पुढे येत आहे, त्याला संपविलेले आहे.

७) म्हणजे या महिन्यांचे याच क्रमाने होणे,जो अल्लाहने ठेवला आहे; आणि ज्यांच्यात चार आदरणीय आहेत. आणि हाच हिशेब बरोबर, आणि परीपूर्ण आहे.

८) म्हणजे या आदरणीय महिन्यात लढाई करून, त्यांची आदरणीयता नष्ट करून, आणि अल्लाहचा आज्ञाभंग करून.

९) म्हणजे आदरणीय महिने निघून गेल्यानंतर, या शिवाय की ते लढण्याला भाग पाडतील; तर मग आदरणीय महिन्यांत सुद्धा, तुमच्यासाठी लढणे योग्य आहे.

إِنَّمَا ٱلنَّسِىٓءُ زِيَادَةٌ فِى ٱلْكُفْرِ يُضَلُّ بِهِ ٱلَّذِينَ كَفَرُوا۟ يُحِلُّونَهُۥ عَامًا وَيُحَرِّمُونَهُۥ عَامًا لِّيُوَاطِـُٔوا۟ عِدَّةَ مَا حَرَّمَ ٱللَّهُ فَيُحِلُّوا۟ مَا حَرَّمَ ٱللَّهُ ۚ زُيِّنَ لَهُمْ سُوٓءُ أَعْمَٰلِهِمْ ۗ وَٱللَّهُ لَا يَهْدِى ٱلْقَوْمَ ٱلْكَٰفِرِينَ ﴿٣٧﴾

महिन्यांचे मागेपुढे सारून देणे, ही कुफ्रची पराकाष्ठा आहे[१]. यामुळे ते लोक मार्गभ्रष्टतेत टाकले जातात, जे काफिर आहेत. एका वर्षी तर त्याला हलाल करून घेतात, आणि एका वर्षी यालाच आदरणीय करून घेतात. की अल्लाह ने जे आदरणीय आहे त्याच्या गणतीत तर मेळ घालून घेतला[२]. मग त्याला हलाल करून घ्यावे, ज्याला अल्लाहने हराम केले आहे. त्यांना त्यांची वाईट कामे चांगली करून दाखविली गेली आहेत; आणि काफिर लोकांना अल्लाह मार्ग दाखवित नसतो. ३७

يَٰٓأَيُّهَا ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ مَا لَكُمْ إِذَا قِيلَ لَكُمُ ٱنفِرُوا۟ فِى سَبِيلِ ٱللَّهِ ٱثَّاقَلْتُمْ إِلَى ٱلْأَرْضِ ۚ أَرَضِيتُم بِٱلْحَيَوٰةِ ٱلدُّنْيَا مِنَ ٱلْءَاخِرَةِ ۚ فَمَا مَتَٰعُ ٱلْحَيَوٰةِ ٱلدُّنْيَا فِى ٱلْءَاخِرَةِ إِلَّا قَلِيلٌ ﴿٣٨﴾

हे ईमानवाल्यांनो! तुम्हास काय होऊन गेले आहे की जेव्हा तुम्हास सांगितले जाते की चला अल्लाहच्या मार्गात कूच करा. तर तुम्ही जमीन धरून बसतात. काय तुम्ही परलोकाच्या ऐवजी, ऐहिक आयुष्यावरच संतुष्ट होऊन गेलात? ऐका! ऐहिक जीवन तर परलोकाच्या मुकाबल्यात फारच अत्यल्प आहे. ३८

إِلَّا تَنفِرُوا۟ يُعَذِّبْكُمْ عَذَابًا أَلِيمًا وَيَسْتَبْدِلْ قَوْمًا غَيْرَكُمْ وَلَا تَضُرُّوهُ شَيْـًٔا ۗ وَٱللَّهُ عَلَىٰ كُلِّ شَىْءٍ قَدِيرٌ ﴿٣٩﴾

जर तुम्ही न निघाल, तर अल्लाहतआला तुम्हाला दु:खदायक शिक्षा देईल; आणि तुमच्या जागी आणखी लोक बदलून आणेल. तुम्ही अल्लाहतआलाचे काही नुकसान करूशकत नाही[३]. आणि अल्लाह सर्व सामर्थ्यवान आहे. ३९

१) 'नसीऊन' चा अर्थ, मागे सारण्याचा आहे. अरबांमध्ये सुद्धा, आदरणीय महिन्यांमध्ये, लढाई झगडे आणि लुटमारला, फारच नावडते समजले जात होते. परंतु क्रमश: तीन महिने, त्यांच्या आदराला कायम ठेऊन, लढाई आणि रक्तपातापासून वाचणे, त्यांच्यासाठी फारच कठीण होते. यासाठी त्यांनी यांतून असा मार्ग काढला होता की, जेव्हा ते आदरणीय महिन्यांत लढाई आणि लुटमार करू इच्छित, त्यांत ते करून टाकत; आणि जाहीर करून टाकत की, याच्या जागी, अमुक महिना आदरणीय होईल. उदाहरणार्थ मोहर्रमच्या महिन्यांत हुरमत तोडून, त्याच्या जागी सफरला हुरमत वाला महिना म्हणून ठरवत असत. अशाप्रकारे ते आदरणीय महिन्यांत पुढे मागे करीत असत. आणि अदलबदल करीत असत. याला 'नसी' म्हणण्यात येत असे. अल्लाहतआलाने याच्या बाबतीत म्हटले की ही कुफ्रमध्ये अधिकता आहे. कारण की, या अदलाबदलाने उद्देश्य युद्ध आणि ऐहिक फायद्यांच्या प्राप्तीशिवाय काही नाही. आणि नबी करीम ﷺ नी पण याला संपविण्याची घोषणा, हे सांगून केली की, काळ फिरून फिरून आपल्या मूळ स्थितीत येऊन गेला आहे. म्हणजे आता, भविष्यांत महिन्याचा क्रम अशाचप्रकारे राहील, ज्याप्रमाणे विश्वाच्या सुरुवातीपासून चालत आला आहे.

२) म्हणजे एका महिन्याची हुरमत तोडून, त्याच्या जागी दुसऱ्या महिन्याला हुरमत वाला ठरविल्याने, त्यांचा उद्देश्य हा होता की, अल्लाहने जे चार महिने हुरूमतवाले ठेवले आहेत. त्यांची मोजणी बरोबर व्हावी. म्हणजे मोजणी करण्यात अल्लाहची बरोबरी करीत असत. परंतु अल्लाहने जे युद्ध, झगडे आणि लुटमारीपासून मना केले होते; त्याची त्यांना काही पर्वा नव्हती. परंतु याच अत्याचारपूर्ण कार्यवाहीसाठीच ते अदलबदल करीत असत.

३) रोमचा ख्रिस्ती बादशाह 'हिरक्ल'च्या बाबतीत सूचना मिळाली की, तो मुसलमानांच्या विरूद्ध युद्धाची तयारी करीत आहे. म्हणून नबी ﷺ नी, पण याच्यासाठी तयारीचा हुकूम देऊन दिला. ही शव्वाल ९ हिजरीची घटना आहे. ऋतुमान कडक उन्हाळ्याचे होते. आणि प्रवास फार लांबचा होता. काही मुसलमान आणि दांभिकांवर हा हुकूम फारच भारी पडला. ज्याचे प्रकटीकरण या महावाक्यात केले गेले आहे. आणि त्यांना दाटदपट करण्यात आली. हे तबूक युद्ध म्हणण्यांत येते. जे वास्तविक झालेच नाही. वीस दिवस मुसलमान, सीरिया देशाच्या जवळ तबूक मध्ये राहून परत आले. याला 'जैशुल अुसरा' म्हटले जाते; कारण की, या लांबच्या प्रवासांत, या सैन्याला भरपूर अडीअडचणींना आणि त्रासाला तोंड द्यावे लागले होते. 'इस्सा कल्तुम' म्हणजे आळस करतात आणि मागे राहून जाऊ इच्छिता. असे काही लोकांकडून घडले. परंतु हे सर्वांना उद्देश्यून म्हटले गेले. (फत्हुल कदीर)

إِلَّا تَنصُرُوهُ فَقَدْ نَصَرَهُ اللَّهُ إِذْ أَخْرَجَهُ الَّذِينَ كَفَرُوا ثَانِيَ اثْنَيْنِ إِذْ هُمَا فِي الْغَارِ إِذْ يَقُولُ لِصَاحِبِهِ لَا تَحْزَنْ إِنَّ اللَّهَ مَعَنَا ۖ فَأَنزَلَ اللَّهُ سَكِينَتَهُ عَلَيْهِ وَأَيَّدَهُ بِجُنُودٍ لَّمْ تَرَوْهَا وَجَعَلَ كَلِمَةَ الَّذِينَ كَفَرُوا السُّفْلَىٰ ۗ وَكَلِمَةُ اللَّهِ هِيَ الْعُلْيَا ۗ وَاللَّهُ عَزِيزٌ حَكِيمٌ ﴿٤٠﴾

**जर तुम्ही त्यांची मदत केली नाही,तर अल्लाहनेच त्यांची मदत केली; त्यावेळेस जेव्हा काफिरांनी त्यानां (देशांतून) काढून लावले होते; दोनमधून दुसरा, जेव्हा की दोघे गुहेत होते, जेव्हा ते आपल्या साथीदाराला सांगत होते, दुःख करू नकोस, अल्लाह आमच्या बरोबर आहे[१]. मग अल्लाहतआलाने आपल्याकडून त्यांचेवर मन:शांती अवतरीत करून, सैन्याने त्यांची मदत केली; ज्यांना तुम्ही पाहिले पण नाही[२]. त्याने काफिराचा बोल खाली पाडला. आणि उंच व प्रिय तर अल्लाहचाच कलमा आहे[३]. आणि अल्लाह सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. ४०**

انفِرُوا خِفَافًا وَثِقَالًا وَجَاهِدُوا بِأَمْوَالِكُمْ وَأَنفُسِكُمْ فِي سَبِيلِ اللَّهِ ۚ ذَٰلِكُمْ خَيْرٌ لَّكُمْ إِن كُنتُمْ تَعْلَمُونَ ﴿٤١﴾

**निघून पडा, हलके फुलके असाल तरी, आणि भारी भक्कम असाल तरी सुद्धा[४], आणि (आपल्या) पालनकर्त्याच्या मार्गात आपल्या तन मन धनाने जिहाद करा; हेच तुमच्यासाठी उत्तम आहे, जर तुमच्यात ज्ञान असेल. ४१**

لَوْ كَانَ عَرَضًا قَرِيبًا وَسَفَرًا قَاصِدًا لَّاتَّبَعُوكَ وَلَٰكِن بَعُدَتْ عَلَيْهِمُ الشُّقَّةُ ۚ وَسَيَحْلِفُونَ بِاللَّهِ لَوِ اسْتَطَعْنَا لَخَرَجْنَا مَعَكُمْ يُهْلِكُونَ أَنفُسَهُمْ وَاللَّهُ يَعْلَمُ إِنَّهُمْ لَكَاذِبُونَ ﴿٤٢﴾

**जर लवकर प्राप्त होणारी संपत्ती व सामान असता[५], आणि प्रवास पण सोपा असता, तर हे जरूर आपल्यामागे आले असते[६]; परंतु यांच्यावर तर दुरचा (प्रवास) कठीण होऊन गेला. आतातर हे अल्लाहच्या शपथा घेतील, की जर आमच्यात सामर्थ्य आणि शक्ती असती, तर खचितच् आपल्या बरोबर निघालो असतो; हे आपल्या जिवांचा स्वत:च नाश करून घेत आहेत[७]. यांचे खोटे होण्याचे खरे ज्ञान, अल्लाहला आहे. ४२**

१) जिहादने मागे रहाणे किंवा, जीव वाचविणाऱ्यांना सांगण्यात येत आहे की, जर तुम्ही मदत करणार नाही, तर अल्लाहतआला तुमच्या मदतीचा याचक नाही.अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराची मदत, त्यावेळी सुद्धा केली, ज्यावेळी त्याने गुहेत आश्रय घेतला होता. आणि आपले साथीदार (म्हणजे ह.अबुबकर सिद्दीक ﵁) ला सांगितले होते, ''दु:ख करू नकोस! अल्लाह आमच्या बरोबर आहे.'' याचा तपशील हदीसमध्ये येतो. ह.अबुबकर सिद्दीक ﵁ म्हणतात. ''जेव्हा आम्ही गुहेत होतो, तेव्हा मी नबी करीम ﷺ ला सांगितले की जर ते मुशरिकीन (जे आमच्या पाठलागावर आहेत) आपल्या पायांकडे पाहतील, तर अवश्य आम्हास पाहून घेतील.'' ह.नबी करीम ﷺ नी म्हटले, ''हे अबुबकर! तुमचा या दोघांच्या बाबतीत काय विचार आहे ज्यांच्यात तिसरा अल्लाह आहे.'' (स.बुखारी, तफसीर सू.तौबा) म्हणजे अल्लाहची मदत आणि सहाय्य ज्यांच्या बरोबर आहे.

२) हे मदतीचे ते दोन स्वरूप वर्णन केले आहे; ज्यामुळे रसूलुल्लाह ﷺ ची मदत केली गेली एक मन:शांती, दुसरे देवदूतांकडून समर्थन.

३) काफिरांच्या कलम्याने शिर्क आणि अल्लाहच्या कलम्याने, एकेश्वरवाद (तौहिद) अभिप्रेत आहेत. ज्याप्रमाणे एका हदीशीमध्ये वर्णन करण्यात आले आहे. रसूलुल्लाह ﷺ ला विचारण्यात आले, एक मनुष्य आपल्या बहादुरीची कमाल दाखविण्यासाठी लढतो; एक घराण्याच्या तरफदारी आणि प्रतिष्ठेसाठी लढतो; एक आणखी लोकांच्या पहाण्यासाठी लढतो. यांत अल्लाहच्या मार्गांत लढणारा कोण आहे? आपण ﷺ नी फर्माविले '' जो यासाठी लढतो की अल्लाहचा कलमा बुलंद होऊन जावा, तो अल्लाहच्या मार्गांत आहे'' (स.बुखारी, स. मुस्लिम)

४) याचे वेगवेगळे भावार्थ वर्णन करण्यात आले आहेत. उदाहणार्थ वैयक्तिक स्वरूपात, किंवा एकत्रित स्वरूपात, खुशीने किंवा नाखुषीने, गरीब असो अथवा श्रीमंत, तरूण असो अथवा वृद्ध. पायी असो वा स्वार, बालबच्चेवाला असो किंवा बिन बालबच्चेवाला, तो पुढे सरसावणाऱ्यांतून असो किंवा मागून सैन्यात दाखल होणारा असो. इमाम शौकानी म्हणतात, महावाक्याचा गर्भितार्थ, सर्व अर्थांवर होऊ शकतो. यासाठी की या महावाक्याचा अर्थ आहे की, ''तुम्ही कूच करा, मग चालणे फिरणे तुमच्यावर जड असो अथवा हलके.'' आणि याच्या भावार्थांत चर्चित सर्व अर्थ येऊन जातात.

५) येथून त्या लोकांचे वर्णन सुरू होत आहे, ज्यांनी सबबी पुढे करून, नबी ﷺ कडून परवानगी घेतली होती; वास्तविक त्यांच्या जवळ काहीही सबब नव्हती, 'अर्ज' ने अभिप्रेत जे ऐहिक फायदे पुढे येतील म्हणजे माले गनीमत.

६) म्हणजे आपण ﷺ बरोबर जिहादमध्ये शामील झाले असते. परंतु लांबच्या प्रवासाने त्यांना नाना बहाणे करण्याला भाग पाडले.

७) म्हणजे खोट्या शपथा घेऊन. कारण खोटी शपथ खाणे मोठे पाप (गुनाहे कबीरा) आहे.

عَفَا اللّٰهُ عَنْكَ ۚ لِمَ اَذِنْتَ لَهُمْ حَتّٰى يَتَبَيَّنَ لَكَ الَّذِيْنَ صَدَقُوْا وَ تَعْلَمَ الْكٰذِبِيْنَ ﴿٤٣﴾

अल्लाह आपणास माफ करो! आपण त्यांना का परवानगी दिली? याच्याशिवाय की आपल्यासमोर खरे लोक जाहीर होऊन गेले असते; आणि खोट्या लोकांना पण आपण जाणून घेतास[१] ४३

لَا يَسْتَاْذِنُكَ الَّذِيْنَ يُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ اَنْ يُّجَاهِدُوْا بِاَمْوَالِهِمْ وَ اَنْفُسِهِمْ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌۢ بِالْمُتَّقِيْنَ ﴿٤٤﴾

अल्लाह आणि कयामतच्या दिवसावर ईमान ठेवणारे, तन मन आणि धनाने जिहाद करण्यापासून, कधीही थांबून रहाण्याची, आपल्याजवळ परवानगी मागणार नाही[२]. आणि अल्लाहतआला (आपल्यास) भिऊन वागणाऱ्यांस खूप जाणतो ४४

اِنَّمَا يَسْتَاْذِنُكَ الَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَ الْيَوْمِ الْاٰخِرِ وَارْتَابَتْ قُلُوْبُهُمْ فَهُمْ فِيْ رَيْبِهِمْ يَتَرَدَّدُوْنَ ﴿٤٥﴾

ही परवानगी तर तेच आपणाजवळ मागतात, ज्यांना न अल्लाहवर ईमान आहे, न शेवटच्या दिवसाचा भरोसा आहे; ज्यांची मने शंकेत पडली आहेत, आणि ते आपल्या शंकेतच बुचकळ्यांत पडले आहेत[३] ४५

وَلَوْ اَرَادُوا الْخُرُوْجَ لَاَعَدُّوْا لَهٗ عُدَّةً وَّلٰكِنْ كَرِهَ اللّٰهُ انْۢبِعَاثَهُمْ فَثَبَّطَهُمْ وَقِيْلَ اقْعُدُوْا مَعَ الْقٰعِدِيْنَ ﴿٤٦﴾

जर त्यांचा इरादा जिहादसाठी निघण्याचा असता, तर ते या प्रवासासाठी, सामानाची तयारी करून ठेवते[४]. परंतु अल्लाहला याचे उठणे पसंतच नव्हते. म्हणून त्यांना प्रयत्न करण्यापासूनच रोकून देण्यात आले[५]. आणि सांगून देण्यात आले की, तुम्ही तर बसून रहाणाऱ्यांसोबत बसूनच रहा[६] ४६

لَوْ خَرَجُوْا فِيْكُمْ مَّا زَادُوْكُمْ اِلَّا خَبَالًا وَّلَا۟اَوْضَعُوْا خِلٰلَكُمْ يَبْغُوْنَكُمُ الْفِتْنَةَ ۚ وَفِيْكُمْ سَمّٰعُوْنَ لَهُمْ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌۢ بِالظّٰلِمِيْنَ ﴿٤٧﴾

जर हे तुमच्याबरोबर मिळून, निघाले असते, तरी तुमच्यासाठी फिसादा शिवाय आणखी काही केले नसते[१]. किंबहुना तुमच्या दरम्यान दौडा दौड करून आणि तुमच्यात झगडाफिसाद करण्याचा प्रयत्न[२] करते. त्यांना मानणारे (जासूस) स्वत: तुमच्यातच[३] आहेत. आणि अल्लाह या जालिम लोकांस खूप जाणतो ४७

لَقَدِ ابْتَغَوُا الْفِتْنَةَ مِنْ قَبْلُ وَقَلَّبُوْا لَكَ الْاُمُوْرَ حَتّٰى جَآءَ الْحَقُّ وَظَهَرَ اَمْرُ اللّٰهِ وَهُمْ كٰرِهُوْنَ ﴿٤٨﴾

हे तर यापूर्वी सुद्धा झगडा फिसादाची संधी शोधत राहिले आहेत. आणि तुझ्यासाठी कामांची उलथापालथ करीत राहिले आहे. येथपावेतो की, सत्य येऊन पोहचले, आणि अल्लाहचा हुकूम प्रबळ होऊन राहिला[४]. आणि ते नाखुषच होऊन राहिले[५] ४८

وَمِنْهُمْ مَّنْ يَّقُوْلُ ائْذَنْ لِّيْ وَلَا تَفْتِنِّيْ ؕ اَلَا فِي الْفِتْنَةِ سَقَطُوْا ؕ وَاِنَّ جَهَنَّمَ لَمُحِيْطَةٌۢ بِالْكٰفِرِيْنَ ﴿٤٩﴾

यांच्यातून कोणी म्हणतो आहे, मला परवानगी देऊन द्या, फितन्यात टाकू नका, सावध रहा ते तर फितन्यात पडून चुकले आहेत, आणि खचित्च नरकाग्नी काफिरांना घेरून आहे[६]. ४९

१) हे नबी करीम ﷺ ला सांगण्यात येत आहे की, जिहादमध्ये भाग न घेणाऱ्यांना, आपण चौकशी विना की, याचे जवळ सबळ कारण आहे की, नाही, का परवानगी देऊन टाकली? परंतु या दटावणीमध्ये सुद्धा प्रेमाचा अंतर्भाव प्रबळ आहे. यासाठी या कोताईवर माफीचे स्पष्टीकरण पहिलेच करून देण्यात आले आहे. लक्षात असू द्यावे की ही तंबी यासाठी करण्यात आली आहे, परवानगी देण्यात घाई करण्यात आली; आणि पूर्णपणे चौकशी करण्याची आवश्यकता वाटली नाही. नाहीतर चौकशीनंतर, गरजवंतांना परवानगी देण्याची, आपणास परवानगी होती. जसे की सांगितले गेले, ''जेव्हा हे लोक तुमच्याजवळ, आपल्या काही कामांकरीता परवानगी मागतील, तर ज्याला आपण इच्छाल, परवानगी देऊन टाकत जा.'' (सू. नूर-६२) ''ज्याला इच्छाल'' चा अर्थ हाच आहे, ज्याच्याजवळ सबळ कारण असेल; त्याला परवानगी देण्याचा तुला अधिकार प्राप्त आहे.

२) हे खऱ्या ईमानवाल्यांचे कर्तृत्व वर्णन करण्यात आले आहे. किंबहुना त्यांची तर सवय ही आहे की, ते फारच आवडीने, आणि बढून चढून, जिहादमध्ये भाग घेतात.

३) हे त्या दांभिकांचे वर्णन आहे ज्यांनी खोटे बहाणे करून, रसूल ﷺ कडून, जिहादमध्ये न जाण्याची परवानगी मिळवून घेतली होती. यांच्या बाबतीत सांगण्यात आले की, हे अल्लाहवर आणि शेवटच्या दिवसांवर ईमान ठेवित नाहीत. याचा अर्थ हा आहे की, याच ईमानच्या नसल्याने, त्यांना जिहादपासून पळ काढण्याला भाग पाडले आहे. जर ईमान यांच्या

अंत:करणात भिनले असते, तर न हे जिहादपासून पळते, न शंका कुशंका यांच्या मनात निर्माण झाल्या असत्या.

**मलहुजा** : लक्षात असू द्यावे की, जिहादमध्ये भाग घेण्याच्या बाबतीत, मुसलमानांचे चार प्रकार आहेत.

पहिले ते मुसलमान जे कुठलाही विचार केल्याशिवाय तयार झाले. दुसरे ते ज्यांना सुरवातीला विचार पडला; आणि त्यांची मने डावाडोल झालीत. परंतु लगेच या विचारांतून बाहेर पडले. तिसरे ते जे वृद्धत्व, आजार किंवा स्वारी आणि प्रवासखर्च नसल्याने, खरोखरच जाऊ शकत नव्हते. आणि ज्यांना स्वत: अल्लाहतआलाने परवानगी देऊन दिली होती. (यांचे वर्णन महावाक्य ९१-९२ मध्ये आहे.) चौथा प्रकार तो जो केवळ आळसामुळे शामील झाला नाही. आणि जेव्हा नबी ﷺ परत आलेत, तेव्हा त्यांनी आपल्या गुन्ह्याची कबुली देऊन, आपल्या स्वत:ला पश्चात्ताप व्यक्त करण्याला, आणि शिक्षा देण्याला, सादर करून दिले. यांच्याशिवाय बाकी दांभिक आणि त्यांचे हेर होते. येथे मुसलमानांचा पहिला वर्ग आणि दांभिकांचा उल्लेख आहे. मुसलमानांच्या बाकी तीन प्रकारांचे वर्णन, पुढे येईल.

४) हे त्याच दांभिकांबद्दल सांगण्यात येत आहे, ज्यांनी खोटे बोलून, परवानगी मिळवून घेतली होती; की जर ते जिहादमध्ये जाण्याचा विचार करते, तर जरूर त्याच्यासाठी तयारी करते.

५) 'फसब्बत्तहूम' चा अर्थ आहे त्यांना थांबवून ठेवले. म्हणजे मागे रहाणे त्यांच्यासाठी आवडते बनवून देण्यात आले. बस ते आळशी होऊन गेलेत; आणि मुसलमानांबरोबर निघाले नाहीत. (अयसरूत तफासीर) अर्थ हा आहे की, अल्लाहच्या ज्ञानांत, त्यांची कारस्थाने आणि खलबते होती. यासाठी अल्लाहची प्रारब्धीय मर्जी हीच होती की, त्यांनी जाऊनये.

६) हे एक तर अल्लाहच्या याच मर्जीचा खुलासा आहे. जो प्रारब्धात लिहिलेला होता. किंवा नाराजी म्हणून, आणि प्रकोप म्हणून, रसूलुल्लाह ﷺ कडून सांगण्यात आले की, बरे आहे, तुम्ही स्त्रिया, मुले, आजारी आणि म्हाताऱ्यांच्या रांगेत शामील होऊन, त्यांच्याप्रमाणे घरांत बसून रहा.

७) हे दांभिक जर इस्लामी लष्कराबरोबर शामील होते; तर हे चुकीचे मत आणि सल्ला देऊन, मुसलमानांमध्ये आपसातील तणावाला कारणीभूत होते.

८) 'ईज़ाअ' चा अर्थ होतो आपल्या स्वारीला जलद गतीने पळविणे. अर्थ हा आहे की, चुगलखोरी वगैरेच्या मार्फत, तुमच्यात फितना करून टाकण्यामध्ये, त्यांनी मागे पुढे पाहिले नसते; आणि फितन्याचा अर्थ आहे एकतेला छिन्न विछिन्न करून टाकणे, आणि त्यांच्या आपसात, शत्रुत्व आणि तिरस्कार, निर्माण करून देणे आहे.

९) याने ठाऊक होते की, दांभिकांची हेरगिरी करणारी माणसे, ईमानवाल्यांबरोबर सुध्दा लष्करात उपस्थित होती; जे दांभिकांना, मुसलमानांच्या बातम्या पोहचवत असत.

१०) म्हणून त्याने, मागे होऊन गेलेल्या आणि पुढे होणाऱ्या घटनांची, तुम्हाला सूचना देऊन दिली आहे; आणि हे पण दाखवून दिले आहे की, हे दांभिक जे बरोबर गेले नाहीत, तर तुमच्यासाठी चांगलेच झाले. जर हे जाते तर या वाईट गोष्टी त्यांच्यामुळे निर्माण झाल्या असत्या.

११) म्हणजे हे दांभिक, तर जेव्हापासून आपण ﷺ मदीनेत आला आहात, आपल्या विरूद्ध फितने शोधत रहातात. आणि मामल्यांना बिघडविण्यात कार्यरत रहात आले आहेत. येथपावेतो की, बद्रमध्ये अल्लाहतआलाने आपणास विजय आणि प्राबल्य मिळवून दिले; जे यांचेसाठी फारच असह्य होते. अशाचप्रकारे उहदच्या युद्धाच्या प्रसंगीपण, दांभिकांनी रस्त्यातूनच परत फिरून, कठिणता (मुश्किलात) निर्माण करण्याची, आणि याच्यानंतर सुद्धा प्रत्येक प्रसंगी बिघाड करण्याचा प्रयत्न करीत राहिले; येथ पावेतो की मक्केवर विजय मिळून गेला. आणि बहुतेक अरब मुसलमान होऊन गेलेत. ज्याच्यावर खेदाने आणि दु:खाने हात चोळत आहेत.

१२) 'मला फितन्यांत टाकू नका.' चा एक अर्थ हा आहे की, जर आपण मला परवानगी देणार नाही, तर मला परवानगी शिवाय रहाण्यावर मोठा गुन्हा होईल. या अनुषंगाने फितना गुन्ह्याच्या अर्थांत होईल. म्हणजे मला गुन्ह्यात टाकू नका. दुसरा अर्थ फितन्याचा नाश पावणे आहे. म्हणजे मला बरोबर नेऊन माझा नाश करू नका. सांगण्यात येते की, जद बिन कैसने विनंती केली की, मला बरोबर नेऊ नका. रोमच्या स्त्रियांना पाहून मी स्वत:वर ताबा ठेवूशकणार नाही. यावर नबी सल्लल्लाहु अलैहे व सल्लमनी तोंड फिरवून घेतले, आणि परवानगी देऊन टाकली. नंतर हे महावाक्य अवतरीत झाले. अल्लाहतआलाने फर्माविले, ''फितन्यात तर ते पडून चुकले आहेत.'' म्हणजे जिहादपासून मागे रहाणे, आणि त्याच्यापासून पळ काढणे, स्वत:च एक फितना आणि फार मोठे गुन्ह्याचे काम आहे. ज्यात हे पडलेच आहेत. आणि मेल्यानंतर नरकाग्नी यांना घेरून घेणार आहे; ज्यापासून पळण्याचा कोणताही मार्ग यांच्या जवळ असणार नाही.

إِن تُصِبْكَ حَسَنَةٌ تَسُؤْهُمْ ۖ وَإِن تُصِبْكَ مُصِيبَةٌ يَقُولُوا قَدْ أَخَذْنَا أَمْرَنَا مِن قَبْلُ وَيَتَوَلَّوا وَّهُمْ فَرِحُونَ ﴿٥٠﴾

आपले काही भले होऊन जाईल, तर त्यांना (फार) वाईट वाटते; आणि काही वाईट होऊन जाईल, तर ते म्हणतात, आम्ही तर आमचा मामला पहिल्यापासूनच दुरूस्त करून घेतला होता; मग तर फारच ऐट दाखवित, परत जातात[१] (५०)

قُل لَّن يُصِيبَنَا إِلَّا مَا كَتَبَ اللَّهُ لَنَا هُوَ مَوْلَانَا ۚ وَعَلَى اللَّهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُؤْمِنُونَ ﴿٥١﴾

आपण सांगून टाका की, आमच्यापर्यंत कुठलीही गोष्ट पोहचूच शकत नाही. परंतु अल्लाहने आमच्यासाठी जे लिहून टाकले आहे. तो आमचा कार्यसाधक आणि मित्र आहे. आणि ईमानवाल्यांना तर अल्लाहच्या पवित्र व्यक्तीत्वावर भरोसा केला पाहिजे[२] (५१)

قُلْ هَلْ تَرَبَّصُونَ بِنَا إِلَّا إِحْدَى الْحُسْنَيَيْنِ ۖ وَنَحْنُ نَتَرَبَّصُ بِكُمْ أَن يُصِيبَكُمُ اللَّهُ بِعَذَابٍ مِّنْ عِندِهِ أَوْ بِأَيْدِينَا ۖ فَتَرَبَّصُوا إِنَّا مَعَكُم مُّتَرَبِّصُونَ ﴿٥٢﴾

सांगून टाका की, तुम्ही आमच्या बाबतीत, ज्या गोष्टीची वाट पहात आहेत, त्या दोन चांगल्या गोष्टीतून एक आहे[३]. आणि आम्ही तुमच्या बाबतीत तिची वाट पहात आहोत,की एक तर, अल्लाहतआला आपल्याकडून कोणी शिक्षा तुम्हास देईन, किंवा आमच्या हातून[४]; बस एका बाजूने तुम्ही वाट पहा, दुसऱ्या बाजूने तुमच्याबरोबर आम्ही पण वाट पहात आहोत (५२)

قُلْ أَنفِقُوا طَوْعًا أَوْ كَرْهًا لَّن يُتَقَبَّلَ مِنكُمْ ۖ إِنَّكُمْ كُنتُمْ قَوْمًا فَاسِقِينَ ﴿٥٣﴾

सांगून टाका की, तुम्ही खुशीने किंवा ना खुशीने, कसाही सुद्धा खर्च करा; तो कदापि मान्य केला जाणार नाही[५]. खचित्‌च तुम्ही आज्ञाभंजक लोक आहात (५३)

وَمَا مَنَعَهُمْ أَن تُقْبَلَ مِنْهُمْ نَفَقَاتُهُمْ إِلَّا أَنَّهُمْ كَفَرُوا بِاللَّهِ وَبِرَسُولِهِ وَلَا يَأْتُونَ الصَّلَاةَ إِلَّا وَهُمْ كُسَالَىٰ وَلَا يُنفِقُونَ إِلَّا وَهُمْ كَارِهُونَ ﴿٥٤﴾

काही कारण, त्यांच्या खर्चाला मान्य न करण्याचे, याशिवाय नाही की, हे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे न मानणारे आहेत; आणि मोठ्या आळसावलेल्या स्थितीतच नमाजीला येतात; आणि संकूचित मनाने खर्च करतात[६]. (५४)

فَلَا تُعْجِبْكَ أَمْوَالُهُمْ وَلَا أَوْلَادُهُمْ ۚ إِنَّمَا يُرِيدُ اللَّهُ لِيُعَذِّبَهُم بِهَا فِي الْحَيَاةِ الدُّنْيَا وَتَزْهَقَ أَنفُسُهُمْ وَهُمْ كَافِرُونَ ﴿٥٥﴾

मग आपणास यांची संपत्ती आणि संतती, आश्चर्यात टाकू नये[७]. अल्लाहची इच्छा हीच आहे की, त्याने त्यांना ऐहिक जीवनांत शिक्षा द्यावी[८]; आणि कुफ्रच्या स्थितीतच त्यांचे प्राण निघून जावेत[९]. (५५)

وَيَحْلِفُونَ بِاللَّهِ إِنَّهُمْ لَمِنكُمْ وَمَا هُم مِّنكُمْ وَلَٰكِنَّهُمْ قَوْمٌ يَفْرَقُونَ ﴿٥٦﴾

हे अल्लाह ची शपथ घेऊन घेऊन सांगत आहे की, हे तुमच्या समूहाचे लोक आहेत; वास्तविक ते मुळात तुमचे नाहीत; गोष्ट फक्त एवढी आहे की, हे भित्रे लोक आहेत[१०]. (५६)

لَوْ يَجِدُونَ مَلْجَأً أَوْ مَغَارَاتٍ أَوْ مُدَّخَلًا لَّوَلَّوْا إِلَيْهِ وَهُمْ يَجْمَحُونَ ﴿٥٧﴾

जर हे कोणी संरक्षणाची जागा किंवा कोणी गुहा, किंवा कोणतेही डोके लपविण्याची जागा मिळवून घेतील, तर आता दोर तोडून त्याच्याकडे धाव घेतील[११] (५७)

وَمِنْهُم مَّن يَلْمِزُكَ فِي الصَّدَقَاتِ فَإِنْ أُعْطُوا مِنْهَا رَضُوا وَإِن لَّمْ يُعْطَوْا مِنْهَا إِذَا هُمْ يَسْخَطُونَ ﴿٥٨﴾

यांच्यात असे पण लोक आहेत, जे खैरातीच्या मालाच्या वाटणीच्या बाबतीत आपल्यावर दोषारोप करतात[१२]. जर त्यांना याच्यातून मिळून जाईल, तर खूष होतील; आणि जर यांच्यातून मिळाले नाही, तर तेव्हाच रूसून जातात[१३]. (५८)

१) या अनुषंगाने 'हसनतून' येथे यश आणि गनीमतचा माल, आणि 'सय्यअतून' ने अपयश, हार आणि अशा प्रकारचे नुकसान, जे युद्धात सामोरे येतात, अभिप्रेत आहेत. यांच्यात त्यांच्या खोडसाळपणाचे प्रकटीकरण आहे; जे दांभिकांच्या मनात होते. यासाठी संकटांवर आनंदी होणे आणि चांगले घडल्यावर, दु:ख आणि त्रास जाणवणे, शत्रुत्वाच्या निशाणीचा पुरावा आहे.

२) हे दांभिकांच्या उत्तरात, मुसलमानांच्या सहनशिलता, दृढता आणि धैर्यासाठी सांगण्यात येत आहे. कारण की, जेव्हा माणसाला हे ठाऊक होऊन जाईल की, अल्लाहकडून दैवांत असलेले काम, कुठल्याही स्वरूपात होणेच आहे.

आणि जे संकट किंवा चांगली गोष्ट आम्हास भेटते, याच अल्लाहच्या दैवाचा भाग आहे. तर माणसासाठी संकटाचे सहन करणे, सोपे आणि त्याच्या धैर्यांत वाढ करण्याला कारणीभूत आहे.
३) म्हणजे, यश किंवा हौतात्म्य, या दोघांमधून जी गोष्ट पण आम्हांस प्राप्त होईल. आमच्या करता हसना म्हणजे भलाईच आहे.
४) म्हणजे आम्ही तुमच्या बाबतीत, दोन वाईटांतून, एका वाईटाची वाट पहात आहोत. की एकतर, अल्लाहतआला आकाशातून तुमच्यावर शिक्षा अवतरीत करेल; ज्याने तुम्ही नाश पावाल; किंवा आमच्या हातून, अल्लाहतआला तुम्हाला (ठार करणे किंवा कैदी बनविणे वगैरे प्रकारची) शिक्षा देईल. तो दोन्ही गोष्टींवर समर्थ आहे.
५) 'अनफिकू' अमरचा 'सेगा' आहे. परंतु येथे एक तर अट किंवा बदलाच्या अर्थांत आहे. म्हणजे जर तुम्ही खर्च कराल, तर कबूल केला जाणार नाही. किंवा हा हुकूम बातमी च्या अर्थांत आहे. अर्थ हा की, दोन्ही गोष्टी बरोबर आहेत. खर्च करा अथवा करू नका. आपल्या मर्जीने अल्लाहच्या मार्गांत खर्च कराल, तरी सुद्धाअमान्य आहे. कारण की मान्यतेसाठी पहिली अट ईमान आहे. आणि तेच तुमच्यांत आढळत नाही आणि नाखुषीने खर्च केलेला माल,तसा पण रद्द केलेलाच आहे. यासाठी की तेथे नियत बरोबर नाही; जी मान्यतेसाठी आवश्यक आहे. हे महावाक्य पण अशा प्रकारे आहे, ज्याप्रमाणे हे आहे, ''आपण त्यांच्यासाठी क्षमा मागा किंवा न मागा'' (म्हणजे दोन्ही गोष्टी बरोबर आहेत!) (सू. तौबा - ८०)
६) यात त्यांच्या दानधर्माची, मान्य न होण्याची तीन प्रमाणे वर्णन केली गेली आहेत. एक यांचे 'कुफ्र' आणि 'आज्ञाभंजन', दुसरे आळसाविलेल्या स्थितीत नमाज पढणे, यासाठी की ते यावर, प्रतिफलाची आशा ठेवीत नाही, आणि त्यांना शिक्षेपासून पण काही भय वाटत नाही.कारण की, पुण्याच्या प्रतिफळाची आशा आणि अल्लाहचे भय, हे पण ईमानाचे लक्षण आहे; ज्यापासून हे वंचित् आहेत. आणि तिसरे नाखुषीने खर्च करणे. आणि ज्या कामात मनापासून इच्छा नसेल, ते मान्य कशाप्रकारे होऊ शकते? म्हणून ही तिन्ही कारणे अशी आहेत की, यांच्यातून एक एक कारण पण, कर्माच्या अमान्यतेसाठी पुरेसे आहे. जर तिन्ही कारणे एके ठिकाणी जमा होऊन गेलीत; तर त्या कर्माचे अल्लाहच्या दारी रद्द होण्यांत काय शंका होऊ शकते?
७) यासाठी की हे सर्व आजमाविण्यासाठी आहे. ''आणि कित्येक प्रकारच्या लोकांना आम्ही ऐहिक जीवनात शोभायमान वस्तू देऊन ठेवल्या आहेत; यासाठी की, त्यांची परीक्षा घ्यावी; त्यांच्याकडे पाहू नका.'' (सू. ताहा-१३१) आणखी फर्माविले, ''काय हे लोक असा विचार करतात की, आम्ही यांची या जगांत जी संपत्ती आणि पुत्रांनी मदत करतो; तर यामुळे त्यांच्या चांगुलपणात आम्ही घाई करीत आहोत? (नाही) परंतु हे समजतच नाहीत. (सू. मोमेनुन - ५५/५६)
८) इमाम इब्ने कसीर आणि इमाम इब्ने जरीर तबरी नी याच्याने जकात आणि इनफाक, अल्लाहच्या मार्गात, अभिप्रेत धरले आहे. म्हणजे या दांभिक लोकांकडून जकात आणि सदकात तर (जे ते स्वत:ला मुसलमान म्हणवून घेण्यासाठी देतात.) जगांत कबुल करून घेतले जावेत; कारण की अशाप्रकारे त्यांना जगांत, आर्थिक मार पण दिला जावा.
९) तथापि त्यांना मृत्यू 'कुफ्र' च्या अवस्थेतच येईल. यासाठी की ते अल्लाहच्या पैगंबराला खऱ्या मनाने, मानावयास तयार नाही. आणि आपल्या कुफ्र आणि दांभिकपणांवर (निफाकवर) च नेहमी प्रमाणे अडून रहाणारे आहेत.
१०) या भीतीपोटी, खोट्या शपथा घेऊन, हे भासवू इच्छितात की, आम्ही सुद्धा तुमच्यातूनच आहोत.
११) म्हणजे फारच लवकर, धावत जाऊन, ते या आश्रयस्थानांत पोहचून जावेत. यासाठी की तुमचा त्यांच्याशी जो पण संबंध आहे, तो प्रेमावर आणि खरा नाही. द्वेष तिरस्कार आणि नाखुषीने आहे.
१२) हे त्यांच्या आणखी एका मोठ्या कोताईचे वर्णन आहे की, ते नबी करीम ﷺ च्या प्रशंसनीय व्यक्ती वैशिष्ट्याला (नाऊजो बिल्लाह) जकात आणि गनीमतच्या वाटणींत, अन्यायी ठरवीत होते; ज्याप्रमाणे 'इब्ने जिलखुवैसिरा' च्या बाबतीत येते की, आपण ﷺ एकदा गनीमतचा माल वाटत होते की, याने सांगितले, ''न्यायाने काम करा!'' आपण ﷺ नी फर्माविले, ''खेद आहे तुझ्यावर! जर मीच न्याय करणार नाही, तर मग कोण करेल?'' अल्हदीस (स.बुखारी क्र.६१६३, स.मुस्लिम क्र.७४४)
१३) जणू या दोषारोपाचा उद्देश, निव्वळ आर्थिक फायदा प्राप्त करणे होते की, अशा प्रकारे त्यांना भिऊन, जास्त वाटा दिला जावा; किंवा ते पात्र असोत किंवा नसोत, त्यांना वाटा अवश्य दिला जावा.

وَلَوْ اَنَّهُمْ رَضُوْا مَآ اٰتٰىهُمُ اللّٰهُ وَ رَسُوْلُهٗ ۙ وَ قَالُوْا حَسْبُنَا اللّٰهُ سَيُؤْتِيْنَا اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖ وَرَسُوْلُهٗۤ ۙ اِنَّاۤ اِلَى اللّٰهِ رٰغِبُوْنَ ﴿٥٩﴾

**जर हे लोक अल्लाह आणि रसूलच्या दिलेल्यावर आनंदीत होते, आणि म्हणते की, अल्लाह आम्हास पुरेसा आहे. लवकरच अल्लाह आम्हास आपल्या कृपेने देईन, आणि त्याचा रसूल सुद्धा, आम्ही तर अल्लाहकडूनच अपेक्षा ठेवणारे आहोत (५९)**

اِنَّمَا الصَّدَقٰتُ لِلْفُقَرَآءِ وَالْمَسٰكِيْنِ وَالْعٰمِلِيْنَ عَلَيْهَا وَالْمُؤَلَّفَةِ قُلُوْبُهُمْ وَفِى الرِّقَابِ وَالْغٰرِمِيْنَ وَفِىْ سَبِيْلِ اللّٰهِ وَابْنِ السَّبِيْلِ ؕ فَرِيْضَةً مِّنَ اللّٰهِ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌ حَكِيْمٌ ﴿٦٠﴾

**खैरातीचा माल (जकात) फक्त गोर गरीबांसाठी[१] आहे; आणि मिस्किनसाठी आणि (जकात) वसूल करणाऱ्यांसाठी; आणि त्यांच्यासाठी, ज्यांची मनधरणी केली जाते; आणि (गुलामांना) स्वतंत्र करण्या मध्ये आणि कर्जदाराकरता, आणि अल्लाहच्या मार्गात;आणि प्रवाशांकरीता[२]; हे अनिवार्य (फर्ज) आहे, अल्लाहकडून; आणि अल्लाह ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. (६०)**

وَمِنْهُمُ الَّذِيْنَ يُؤْذُوْنَ النَّبِىَّ وَيَقُوْلُوْنَ هُوَ اُذُنٌ ؕ قُلْ اُذُنُ خَيْرٍ لَّكُمْ يُؤْمِنُ بِاللّٰهِ وَيُؤْمِنُ لِلْمُؤْمِنِيْنَ وَرَحْمَةٌ لِّلَّذِيْنَ اٰمَنُوْا مِنْكُمْ ؕ وَالَّذِيْنَ يُؤْذُوْنَ رَسُوْلَ اللّٰهِ لَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٦١﴾

**यांच्यातून ते पण आहेत, जे पैगंबराला त्रास देतात; आणि म्हणतात की (हा मनुष्य) कानपिसा आहे. आपण सांगून टाका की, तो कान (किंवा कानाचा हलके होणे) तुमच्या भल्यासाठी आहे[३]. तो अल्लाहवर ईमान ठेवतो; आणि मुसलमानांच्या गोष्टीवर विश्वास ठेवतो; आणि तुमच्यातून जे ईमानवाले आहेत, तो त्यांच्यासाठी रहमत आहे. अल्लाहच्या रसूल ला जे लोक त्रास देतात, त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा आहे. (६१)**

يَحْلِفُوْنَ بِاللّٰهِ لَكُمْ لِيُرْضُوْكُمْ ۚ وَاللّٰهُ وَرَسُوْلُهٗۤ اَحَقُّ اَنْ يُّرْضُوْهُ اِنْ كَانُوْا مُؤْمِنِيْنَ ﴿٦٢﴾

**निव्वळ तुम्हाला खूष करण्यासाठी, तुमच्यासमोर अल्लाहच्या शपथा वाहतात; वास्तविक जर हे ईमानवाले असते, तर अल्लाह आणि त्यांचा पैगंबर, याला जास्त पात्र होते की, त्यांना राजी केले जावे (६२)**

اَلَمْ يَعْلَمُوْۤا اَنَّهٗ مَنْ يُّحَادِدِ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ فَاَنَّ لَهٗ نَارَ جَهَنَّمَ خَالِدًا فِيْهَا ؕ ذٰلِكَ الْخِزْىُ الْعَظِيْمُ ﴿٦٣﴾

**काय यांना ठाऊक नाही की, जो पण, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करेल, त्याच्यासाठी नक्कीच नर्काची आग आहे. ज्यात तो नित्य निरंतर रहाणार आहे. ही मोठीच फजिती आहे. (६३)**

يَحْذَرُ الْمُنٰفِقُوْنَ اَنْ تُنَزَّلَ عَلَيْهِمْ سُوْرَةٌ تُنَبِّئُهُمْ بِمَا فِىْ قُلُوْبِهِمْ ؕ قُلِ اسْتَهْزِءُوْا ۚ اِنَّ اللّٰهَ مُخْرِجٌ مَّا تَحْذَرُوْنَ ﴿٦٤﴾

**दांभिकांना नेहमी या गोष्टीची भीती वाटत रहाते की, कोठे मुसलमानांवर कोणी अध्याय न प्रकटीला जावा, जो यांच्या मनातील गोष्टी यांना कळवून टाकील. सांगून टाका की, तुम्ही थट्टा मस्करी करीत रहा; खचित्च अल्लाहतआला त्याला जाहीर करणार आहे; ज्याला तुम्ही भितात आणि दचकतात (६४)**

१) या महावाक्यांत या टोमण्याला बंद करण्यासाठी जकात घेण्याला पात्र असलेल्या लोकांची चर्चा केली जात आहे. सदकात्ने अभिप्रेत येथे वाजिब सदका म्हणजे जकात आहे. महावाक्याची सुरवात, 'इन्नमा' ने केली गेली आहे. जे कसरच्या 'सैगा' मधून आहे, आणि अलसदकात मध्ये 'लाम' 'तारीफ जिन्स' करताआहे. म्हणजे सदकातचे हे वर्ग (जकात) त्या आठ प्रकारात मर्यादित आहेत, ज्यांचा उल्लेख या महावाक्यांत आहे. यांच्याशिवाय आणखी कोण्या बाबीवर, जकातीच्या रकमेचा उपयोग करणे बरोबर नाही. ज्ञानी लोकांत, या हुकूमाच्या बाबतीत मतभेद आहेत; की या आठ संवर्गावर वांटणी करणे योग्य आहे, किंवा यांच्यातून ज्या बाब किंवा बाबींवर हाकिम किंवा जकात अदा करणारा, योग्य समझेल, आवश्यकतेप्रमाणे खर्च करूशकतो. इमाम शाफई वगैरे पहिल्या मताला मान्यता देणारे आहेत; आणि इमाम अबुहनीफा वगैरे, दुसऱ्या मताचे, आणि हे दुसरे मतच जास्त बरोबर आहे. इमाम शाफईच्या मताच्या अनुषंगाने जकातीची रक्कम आठही बाबींवर खर्च करणे, आवश्यक आहे. म्हणजे आवश्यकपूर्ती आणि प्रयोजन पाहिल्याशिवाय, रकमेचे आठ भाग करून, आठी जागी काही काही रक्कम खर्च केली जावी. जेव्हा की दुसऱ्या मतानुसार, आवश्यकता आणि प्रयोजनाचा विचार करणे आवश्यक आहे. ज्या बाबींवर खर्च करण्याची जास्त आवश्यकता किंवा प्रयोजन कोण्या एका बाबीवर खर्च करण्याला जास्त आवश्यक असेल, तर तेथे आवश्यकता किंवा प्रयोजनानुसार जकातीची रक्कम खर्च केली जाईल. मग जरी दुसऱ्या बाबींवर खर्च करण्यासाठी रक्कम शिल्लक

रहाणार नाही. हे मत पहिल्या मता पेक्षा चांगले आहे.

२) या आठ खर्चांचा थोडक्यात तपशील खालीलप्रमाणे आहे.

१-२) फकीर आणि गरीब कारण की जवळ जवळ आहे. एकाचे संबोधन दुसऱ्यावरपण होऊन जाते म्हणजे फकीराला मिसकीन आणि मिसकीनाला फकीर म्हणून घेतले जाते. म्हणून त्यांच्या वेगवेगळ्या व्याखेत, विशेष मतभेद आहेत. तथापि दोघांच्या भावार्थांत तर ही गोष्ट नक्कीच आहे की, जो गरजवंत असेल, आणि आपल्या गरजा आणि आवश्यकतांना पूर्ण करण्यासाठी, इच्छित रक्कम आणि सामानापासून वंचित असेल; त्यांना फकीर आणि मिसकीन म्हटले जाते. मिसकीनच्या व्याख्येत एक हदीस येते, नबी करीम ﷺ नी फर्माविले, मिसकीन तो भटकणारा नाही, जो एक एक किंवा दोन दोन घास किंवा खजुरीसाठी घरोघर फिरत असेल; किंबहुना, मिसकीन तो आहे, ज्याच्याजवळ इतकी संपत्तीपण नसेल जी त्याला दुसऱ्याकडून बेपर्वा करून देईल. न तो आपल्यावरती अशी गरीबी दाखवील, की लोक गरीब आणि दानधर्मास पात्र समजून, त्याला दानधर्म करतील. न स्वत: लोकांपुढे हात पसरून मागेल. (स.बुखारी व स. मुस्लिम, किताबुल जकात) हदीसमध्ये जणू, खरा मिसकीन, वर उल्लेख केलेल्या माणसाला ठरविले आहे. ३) आमेलीन ने अभिप्रेत, राज्याचे ते कारकून आहेत, जे जकात आणि दानधर्माच्या वसुली आणि वाटण्यावर, आणि त्याचा जमाखर्च ठेवण्यावर नेमलेले असावेत. ४) मोअलेफतुल कुलूब, एकतर ते काफिर आहेत, जे काही प्रमाणात इस्लामकडे झुकलेले आहेत. आणि त्यांची मदत केल्यानंतर ही आशा असावी की ते मुसलमान होऊन जातील. दुसरे त्या नवमुस्लीम व्यक्ती आहेत, ज्यांना इस्लाम वर मजबुतीने कायम ठेवण्यासाठी मदत देण्याची आवश्यकता आहे. तिसऱ्या त्या व्यक्तीपण आहेत, ज्यांना जर मदत केली, तर ही आशा असावी की, ते आपल्या इलाख्यातील लोकांना मुसलमानांवर हल्ला करण्यापासून प्रतिबंधित करतील. आणि अशाप्रकारे त्यांनी जवळच्या दुर्बळ मुसलमानांचे संरक्षण करावे. हे आणि या प्रकारची दुसरी स्वरूपे, मनधरणी करण्याचे आहेत; ज्यांवर जकातची रक्कम खर्च केली जाऊ शकते. मग जरी चर्चित लोक श्रीमंत काअसेनात! अहनाफ् जवळ हे जकात खर्च करण्याचे ठिकाण, संपूण गेले आहे; परंतु ही गोष्ट बरोबर नाही. परिस्थिती आणि पात्रता प्रमाणे प्रत्येक काळांत, या बाबीवर जकातची रक्कम खर्च करणे योग्य आहे. ५) स्वतंत्र करण्यामध्ये काही धर्मपंडीतांनी याच्याने फक्त मुकातब (म्हणजे ते गुलाम जे मालकाच्या खुषीने आपली किंमत मजुरी करून मालकाला देऊन स्वतंत्र होऊ इच्छितात) गुलाम अभिप्रेत आहेत. आणि दुसऱ्या धर्मपंडीतांनी मुकातब आणि गैर मुकातब सर्व प्रकारचे गुलाम अभिप्रेत धरले आहे. इमाम शौकानीने या मताला पुष्टी दिली आहे. ६) गारेमीन ने एक तर तो कर्जदार अभिप्रेत आहे जो आपल्या बाल बच्च्यांसह जेवण आणि कपडे लत्ते आणि जीवनाला आवश्यक गरजा पूर्ण करण्यासाठी, लोकांच्या ओझ्याखाली दबून गेलेत. आणि त्यांच्याजवळ नगद रक्कमपण नाही; आणि असे सामानपण नाही, ज्याला विकून ते कर्ज अदा करूशकतील. दुसरे ते जबाबदार जामिनदार लोक आहेत; जे कोणाला जामीन राहिले. आणि मग ते त्याला अदा करण्याला जबाबदार ठरविले गेलेत. किंवा कोणाचे पीक बर्बाद किंवा व्यवहार तोट्याला होऊन गेला; आणि त्या मुळे तो कर्जबाजारी होऊन गेला. या सर्व व्यक्तींना जकातीच्या माध्यमातून मदत करणे योग्य आहे. ७) फी सबीलिल्लाह् ने अभिप्रेत जिहाद (धर्मयुद्ध) आहे. म्हणजे लष्करी साहित्य, आणि गरजा आणि धर्मयौद्धे (जरी ते श्रीमंतच असले.) यांच्यावर जकातीची रक्कम खर्च करणे योग्य (जाएज) आहे. आणि हदीशींमध्ये येते की, हज आणि उमरापण फी सबीलिल्लाह्मध्ये दाखल आहे. अशाप्रकारे काही धर्मपंडीतांजवळ धर्माचा प्रचार आणि आवाहनपण (तबलीग आणि दावत) फी सबीलिल्लाह्मध्ये दाखल आहे. कारण की याच्याने सुद्धा उद्देश्य जिहादप्रमाणे, अल्लाहच्या कलम्याला बुलंद करणे आहे. ८) इब्नुस् सबील ने अभिप्रेत वाटसरू किंवा प्रवासी आहेत. म्हणजे जर कोणी प्रवासी प्रवासांत मदतीला पात्र होऊन गेला आहे, मग जरी तो आपल्या घरी किंवा वतनात सुखी संपन्न असेल, त्याची मदत जकातीच्या पैशाने केली जाऊ शकते.

३) येथे पुन्हा दांभिक लोकांचे वर्णन करण्यांत येत आहे. नबी ﷺ च्या विरोधांत एक खोडसळ वक्तव्य हे केले की, हा मनुष्य कानाचा कच्चा किंवा हलका आहे. अर्थ हा आहे की, हा प्रत्येकाची गोष्ट ऐकून घेतो. (हे जणूआपण ﷺ च्या सहनशिलता, कृपा आणि क्षमा करणे या वैशिष्ट्यांनी त्यांची फसगत झाली). अल्लाहने फर्माविले की, नाही! आमचा पैगंबर वाईटाची आणि फितन्याची कुठलीही गोष्ट ऐकत नाही. तो जे काही ऐकतो तुमच्यासाठी याच्यात भलाई व चांगुलपणा आहे.

وَلَئِنْ سَاَلْتَهُمْ لَيَقُوْلُنَّ اِنَّمَا كُنَّا نَخُوْضُ وَنَلْعَبُ ؕ قُلْ اَبِاللّٰهِ وَاٰيٰتِهٖ وَرَسُوْلِهٖ كُنْتُمْ تَسْتَهْزِءُوْنَ ﴿٦٥﴾

**आणि जर आपण त्यांना विचाराल, तर स्पष्ट सांगून देतील की, आम्ही तर असेच आपसात, हंशी खेळ करीत होतो, सांगून टाका की, अल्लाह त्याची महावाक्ये, आणि त्याचा पैगंबरच तुमच्या थट्टा मस्करीसाठी राहून गेले आहेत[१]?** (६५)

لَا تَعْتَذِرُوْا قَدْ كَفَرْتُمْ بَعْدَ اِيْمَانِكُمْ ؕ اِنْ نَّعْفُ عَنْ طَآئِفَةٍ مِّنْكُمْ نُعَذِّبْ طَآئِفَةًۢ بِاَنَّهُمْ كَانُوْا مُجْرِمِيْنَ ﴿٦٦﴾

**तुम्ही बहाणे करू नका, खचितच तुम्ही आपल्या ईमानानंतर बेईमान[२] होऊन गेलात; जर आम्ही तुमच्यातून काही लोकांना क्षमा पण करून टाकू[३], तरी काही लोकांना त्यांच्या अपराधांची कडक शिक्षापण देऊ[४]** (६६)

اَلْمُنٰفِقُوْنَ وَالْمُنٰفِقٰتُ بَعْضُهُمْ مِّنْۢ بَعْضٍ ۘ يَاْمُرُوْنَ بِالْمُنْكَرِ وَيَنْهَوْنَ عَنِ الْمَعْرُوْفِ وَيَقْبِضُوْنَ اَيْدِيَهُمْ ؕ نَسُوا اللّٰهَ فَنَسِيَهُمْ ؕ اِنَّ الْمُنٰفِقِيْنَ هُمُ الْفٰسِقُوْنَ ﴿٦٧﴾

**सर्व दांभिक पुरूष आणि स्त्रिया, आपसात एकच[५] आहेत; हे वाईट गोष्टींचा हुकूम देतात, आणि चांगल्या गोष्टीपासून मना करतात; आणि मूठ बंद ठेवतात[६]; हे अल्लाहला विसरून गेले, अल्लाहपण त्यांना विसरून गेला[७]. नि:संशय दांभिकच आज्ञाभंजक आणि कुकर्म करणारे आहेत.** (६७)

१) दांभिक लोक अल्लाहच्या महावाक्यांची टिंगल करीत. ईमानवाल्यांची टवाळकी करीत, येथपावेतो की, रसूलुल्लाह् ﷺ च्या बाबतीत पण उद्धट शब्द वापरण्यापासून चुकत नसत. ज्याची सूचना कशा न कशा प्रकारे काही मुसलमानांना आणि मग, रसूलुल्लाह् ﷺ ला होऊन जाई. परंतु जेव्हा त्यांना विचारले जाई, तर स्पष्ट नकार देते. आणि म्हणत की आम्ही असेच आपसांत थट्टा मस्करी करीत होतो. अल्लाहतआलाने फर्माविले, थट्टामस्करी करण्यासाठी काय तुमच्यासमोर अल्लाह आणि त्याची महावाक्ये आणि त्याचा पैगंबरच राहून गेला आहे ? भावार्थ असा की, जर तुमचा उद्देश आपसात थट्टा मस्करी करण्याचा होता, तर त्यांत अल्लाह, त्याची महावाक्ये आणि पैगंबर त्यामध्ये काआला असता? हे नक्कीच तुमच्या द्वेष आणि दांभिकपणाचे प्रकटीकरण आहे, जे अल्लाहची महावाक्ये आणि आमच्या पैगंबराच्या विरोधात तुमच्या मनात आढळून येते.

२) म्हणजे तुम्ही जे ईमान प्रकट करीत आहांत, अल्लाह व रसूलच्या टवाळकी नंतर, त्याचे काही महत्त्व बाकी राहिले नाही. प्रथम तर ते सुद्धा दांभिकपणावरच आधारित आहे. तथापि, याच्यामुळे प्रकटरीत्या तुमची मुसलमानामध्ये गणती होत होती, आता याची पण शक्यता संपलेली आहे.

३) याच्याने अभिप्रेत असे लोक आहेत, ज्यांना आपल्या चुकीची जाणीव होऊन गेली; आणि त्यांनी तौबा करून घेतली; आणि सच्चे मुसलमान बनून गेले.

४) हे ते लोक आहेत, ज्यांना तौबा करण्याची सुबुद्धी झाली नाही; आणि कुफ्र आणि निफाकवर अडून राहिलेत. म्हणून त्या शिक्षेचे कारण पण सांगून देण्यात आले की ते अपराधी होते.

५) दांभिकलोक जे शपथ वाहून मुसलमानांना भासवत होते की, ''आम्ही तुमच्यातूनच आहोत.'' अल्लाहतआलाने याचे खंडन केले की, ईमानवाल्यांशी यांचा काय संबंध ? तथापि हे सर्व दांभिक, मग ते पुरूष असोत किंवा स्त्रिया, एकच आहेत. म्हणजे कुफ्र आणि निफाकमध्ये एक दुसऱ्यावर वरचढ आहेत. पुढे त्यांची वैशिष्ट्ये वर्णन करण्यांत येत आहेत, जी ईमानवाल्यांच्या वैशिष्टयांपासून अगदी उलट आणि त्यांच्या विरूद्ध आहेत.

६) याच्याने अभिप्रेत कंजुषी आहे. म्हणजे ईमानवाल्यांचे वैशिष्टय अल्लाहच्या मार्गांत खर्च करणे आहे; आणि दांभिकांचे याच्या उलट कंजुषी; म्हणजे अल्लाहच्या मार्गांत खर्च करण्यापासून पळ काढणे आहे.

७) म्हणजे अल्लाहपण त्यांच्याशी असा व्यवहार करीन, की जणू तो त्यांना विसरून गेला. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''आज आम्ही तुम्हास अशाचप्रकारे विसरून जाऊ, ज्याप्रमाणे आमच्या भेटीच्या या दिवसाला तुम्ही विसरून गेला होता.'' (सू. जासिया-३४) भावार्थ हा आहे की, ज्याप्रमाणे त्यांनी जगात, अल्लाहच्या आदेशांना सोडून दिले होते, कयामतच्या दिवशी, अल्लाहतआला त्यांना आपल्या कृपा आणि दयेपासून वंचित ठेवील. नाही तर अल्लाहची जात विसरून जाण्यापासून पवित्र आहे. (फत्हुल कदीर)

وَعَدَ اللّٰهُ الْمُنٰفِقِيْنَ وَالْمُنٰفِقٰتِ وَالْكُفَّارَ نَارَ جَهَنَّمَ خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ هِيَ حَسْبُهُمْ ۚ وَلَعَنَهُمُ اللّٰهُ ۚ وَلَهُمْ عَذَابٌ مُّقِيْمٌ ۙ﴿۶۸﴾

अल्लाहतआला त्या दांभिक पुरूष, स्त्रिया आणि काफिरांशी जहन्नमच्या आगीचा वायदा करून चुकला आहे, जेथे हे नित्य निरंतन रहाणार आहेत; तोच त्यांना पुरेसा आहे; त्यांच्यावर अल्लाहने शाप दिला आहे; आणि त्यांच्याच करता कायमची शिक्षा आहे. (६८)

كَالَّذِيْنَ مِنْ قَبْلِكُمْ كَانُوْۤا اَشَدَّ مِنْكُمْ قُوَّةً وَّاَكْثَرَ اَمْوَالًا وَّاَوْلَادًا ؕ فَاسْتَمْتَعُوْا بِخَلَاقِهِمْ فَاسْتَمْتَعْتُمْ بِخَلَاقِكُمْ كَمَا اسْتَمْتَعَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِكُمْ بِخَلَاقِهِمْ وَخُضْتُمْ كَالَّذِيْ خَاضُوْا ؕ اُولٰٓئِكَ حَبِطَتْ اَعْمَالُهُمْ فِي الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ ۚ وَاُولٰٓئِكَ هُمُ الْخٰسِرُوْنَ ﴿۶۹﴾

त्या लोकांसारखे जे तुमच्यापूर्वी[१] होते, तुमच्यापेक्षा जास्त ते शक्तीमान होते, आणि जास्त संपत्ती आणि संततीवाले होते; मग, त्यांनी आपला (जगातला) वाटा उचलून घेतला, मग तुम्ही सुद्धाआपला वाटा उचलून घेतला आहे[२]. जसे तुमच्यापूर्वीचे लोक, आपल्या वाट्यातून फायदा उचलणारे झाले होते, आणि तुम्ही सुद्धाअशाचप्रकारे थट्टा मस्करीयुक्त वादविवाद केला, जसा की त्यांनी केला होता[३]; त्यांची कर्मे इहलोकांत आणि परलोकांत आक्रीत झालीत;हेच लोक तोट्यात आहेत[४] (६९)

اَلَمْ يَاْتِهِمْ نَبَاُ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ قَوْمِ نُوْحٍ وَّعَادٍ وَّثَمُوْدَ ۙ وَقَوْمِ اِبْرٰهِيْمَ وَاَصْحٰبِ مَدْيَنَ وَالْمُؤْتَفِكٰتِ ؕ اَتَتْهُمْ رُسُلُهُمْ بِالْبَيِّنٰتِ ۚ فَمَا كَانَ اللّٰهُ لِيَظْلِمَهُمْ وَلٰكِنْ كَانُوْۤا اَنْفُسَهُمْ يَظْلِمُوْنَ ﴿۷۰﴾

काय त्यांना आपल्या पूर्वीच्या लोकांच्या गोष्टी पोहचल्या नाहीत? नूहच्या लोकांच्या आणि आद आणि समूद, आणि इब्राहीमच्या लोकांच्या आणि मदीयनवाले आणि उलथून पाडलेल्या वस्तीचे[५] लोकांची; यांचे जवळ यांचे पैगंबर प्रमाणे घेऊन पोहचले[६]; अल्लाह असा नव्हता की, त्यांच्यावर जुलूम करता, किंबहुना त्यांनी स्वत;च आपल्यावर जुलूम केला[७]. (७०)

وَالْمُؤْمِنُوْنَ وَالْمُؤْمِنٰتُ بَعْضُهُمْ اَوْلِيَآءُ بَعْضٍ ۘ يَاْمُرُوْنَ بِالْمَعْرُوْفِ وَيَنْهَوْنَ عَنِ الْمُنْكَرِ وَيُقِيْمُوْنَ الصَّلٰوةَ وَيُؤْتُوْنَ الزَّكٰوةَ وَيُطِيْعُوْنَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ ؕ اُولٰٓئِكَ سَيَرْحَمُهُمُ اللّٰهُ ؕ اِنَّ اللّٰهَ عَزِيْزٌ حَكِيْمٌ ﴿۷۱﴾

ईमानवाले पुरूष आणि स्त्रिया आपसात एक दुसऱ्याचे मददगार आणि मित्र आहेत[८]; ते चांगली कामे करण्याचा हुकूम देतात; आणि वाईट कामांपासून मना करतात[९], नमाज पढतात, आणि जकात अदा करतात; अल्लाहची आणि त्यांच्या पैगंबराची गोष्ट मान्य करतात[१०]; हेच लोक आहेत, ज्यांच्यावर अल्लाहतआला लवकरच दया करणार आहे. नि:संशय अल्लाह सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. (७१)

وَعَدَ اللّٰهُ الْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا وَمَسٰكِنَ طَيِّبَةً فِيْ جَنّٰتِ عَدْنٍ ؕ وَرِضْوَانٌ مِّنَ اللّٰهِ اَكْبَرُ ؕ ذٰلِكَ هُوَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ﴿۷۲﴾

त्या ईमानवाल्या पुरूषांशी आणि स्त्रियांशी अल्लाहने त्या स्वर्गांचा वायदा केला आहे, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात आहेत. जेथे ते नित्य नेहमी राहणार आहेत. आणि त्या स्वच्छ आणि पवित्र महालांचा[११], जे त्या नित्य राहणाऱ्या स्वर्गांत आहेत. आणि अल्लाहची सुप्रसन्नता, सर्वांत मोठी गोष्ट आहे[१२]. हेच मोठे साफल्य आहे (७२)

१) म्हणजे तुमची स्थिती सुद्धा, कर्मे आणि परिणांमाच्या दृष्टीने मागील काळांतील काफिरांसारखीच आहेत. आताअदृश्याच्या ऐवजी, ढांभिकांना संबोधन करण्यात येत आहे.

२) 'खलाक' चे ढुसरे भाषांतर, ऐहिक वाटा, पण करण्यात आले आहे. म्हणजे तुमच्या दैवात जगाचा जेवढा वाटा लिहून दिला गेला आहे, तो उपभोगून घ्या; ज्याप्रमाणे तुमच्या पूर्वीच्या लोकांनी, आपला वाटा उपभोगला आणि मग मृत्यू किंवा शिक्षेला पात्र झाले.

३) म्हणजे अल्लाहची महावाक्ये आणि अल्लाहच्या पैगंबरांना नाकारण्यासाठी, किंवा भावार्थ आहे की, ऐहिक साज व सामान आणि खेळ तमाशामध्ये, ज्याप्रमाणे ते मग्न राहिलेत, तुमचीपण हीच स्थिती आहे. महावाक्यात पूर्वीच्या लोकांनी अभिप्रेत ग्रंथधारी म्हणजे यहूदी आणि ख्रिस्ती आहेत. जसे एका हदीसमध्ये नबी ﷺ नी फर्माविले, ''शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची, ज्याच्या हातात माझा प्राण आहे, तुम्ही आपल्या पूर्वीच्या लोकांच्या चालीरितींचा अवश्य अंगिकार कराल; बिल्लास ते बिल्लास, हात ते हात, येथपर्यंत ते जर कोण्या घोरपडीच्या बिळांत घुसले असतील, तर

तुम्ही सुद्धाअवश्य घुसाल, लोकांनी विचारले काय याच्याने अभिप्रेत ग्रंथधारी लोक आहेत? आपण सांगितले, मग कोण?'' (स. बुखारी व स. मुस्लीम) तथापि 'हाता हाताने' हे शब्द त्यांच्यात नाही. हे तबरीच्या भाष्यामध्ये देण्यात आलेल्या एका हदीसमध्ये आहे.

४) 'ऊलाएका' ने अभिप्रेत ते लोक आहेत, जे चर्चित वैशिष्ट्ये आणि सवयीवाले आहेत. म्हणजे ज्याप्रमाणे ते तोट्यात आणि असफल राहिलेत; तुम्हीपण अशाचप्रकारे रहाल.वास्तविक ते शक्तीत तुमच्यापेक्षा जास्त बलवान, आणि संपत्ती आणि संततीमध्ये सुद्धा जास्त होते. असे असून सुद्धा ते अल्लाहच्या शिक्षेपासून वाचूशकले नाहीत. तर तुम्ही जे त्यांच्यापेक्षा प्रत्येक दृष्टीने कमी आहांत, कशा प्रकारे अल्लाहच्या पकडीपासून वाचूशकतात?

५) या ठिकाणी त्या सहा लोकसमूहांचा हवाला देण्यात आला आहे, ज्यांच्या रहाण्याचे ठिकाण सीरिया देश होता. हे अरबी शहरांच्या जवळ आहे. आणि त्यांच्या काही गोष्टी त्यांनी कदाचित् आपल्या वाडवडीलांकडून ऐकल्या पण असतील. ह. नूह ﷺ ची कौम जे प्रलयात बुडवून टाकण्यात आली. आदचे लोक जे शक्ती आणि सामर्थ्यांत सुप्रसिद्ध असून सुद्धा चक्रीवादळाने नष्ट करून टाकण्यात आले. समूदचे लोक, ज्यांना आकाशातील आरोळीने नष्ट करून टाकण्यांत आले. इब्राहीमचे लोक, ज्यांचे बादशाह, नमरूद बिन कन्आन बिन कोशला, डासाने मारून टाकण्यात आले. मदीयनवाले (ह.शोएबचे लोक) ज्यांचा आरोळी, भूकंप आणि ढगांच्या सावलीच्या शिक्षेने नाश करून टाकला गेला. आणि अहले मोतफिकात, याच्याने अभिप्रेत लूतचे लोक आहेत, ज्यांच्या वस्तीचे नाव 'सदूम' होते. 'एअतेफाक' चा अर्थ आहे इन्कलाब, उलथ पालथ करून देणे, यांच्यावर एकतर आकाशातून दगड वर्षाविण्यात आले. दुसरे त्यांच्या वस्तीला वर उचलून खाली फेकून देण्यांत आले; ज्यामुळे पूर्ण वस्ती वर खाली होऊन गेली. या अनुषंगाने त्यांना असहाबे मौतफिकात म्हटले जाते.

६) या सर्व लोकांजवळ यांचे पैगंबर जे यांच्याच लोकांपैकी एक व्यक्ती असे, आलेत. परंतु त्यांनी यांच्या गोष्टीला काही महत्त्व दिले नाही. किंबहुना खोटे ठरविणे, आणि अहंकाराचा मार्ग स्वीकारला, ज्याचा परिणाम, सरतेशेवटी अल्लाहच्या शिक्षेच्या स्वरूपात झाला.

७) म्हणजे ही शिक्षा त्यांच्या जुलुमावर कायम राहिल्यामुळे आणि अडून राहिल्याचा परिणाम आहे. असेच अल्लाहच्या शिक्षेला ते बळी पडले नाहीत.

८) दांभिकांच्या निंदनीय वैशिष्ट्यांच्या तुलनेत ईमानवाल्यांच्या प्रशंसनीय वैशिष्ट्यांची चर्चा होत आहे. पहिले वैशिष्ट्य ते एक दुसऱ्याचे मित्र, मददगार आणि दु:खांत सहभागी होणारे आहेत. ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे, ''ईमानवाले ईमानवाल्यांसाठी एका भिंती सारखे आहेत; जिची एक वीट, दुसऱ्या वीटेच्या मजबुतीला कारणीभूत आहे.'' (स.बुखारी व स. मुस्लीम) दुसऱ्या हदीशीत म्हटले आहे; ''ईमानवाल्यांचे उदाहरण आपसात एक दुसऱ्याशी प्रेम करण्यात, आणि दया करण्यात, एका शरीरासारखे आहेत; जेव्हा शरीराच्या एका अवयवाला त्रास होतो, तर सर्व शरीर तापाला बळी पडते; आणि जागृत रहाते.'' (स. बुखारी व स.मुस्लीम)

९) हे ईमानवाल्यांचे दुसरे खास वैशिष्ट्य आहे. मअरूफ ते आहे ज्याला धर्मशास्त्राने मअरूफ म्हणजे पुण्य आणि चांगुलपणा आणि मुनकर ते आहे, ज्याला धर्मशास्त्राने मुनकर म्हणजे वाईट ठरविले आहे. ते नाही ज्याला लोक, चांगले किंवा वाईट म्हणतात.

१०) नमाज, अल्लाहच्या हक्कात, ठळक उपासना आहे; आणि जकात अल्लाहचे सेवकांच्या हक्काच्या दृष्टीने एक वेगळी महत्त्व ठेवते. याकरीता या दोघांची विशेषकरून चर्चा करून, सांगण्यात आले की, ते प्रत्येक मामल्यांत, अल्लाह व रसूलचे आज्ञापालन करतात.

११) जे मोती आणि प्रवाळापासून तयार केले गेले असतील. अदनचे कित्येक अर्थ केले गेले आहेत. एक अर्थ सातत्याचा आहे.

१२) हदीसमध्ये सुद्धा येते की, स्वर्गाच्या सर्व देणग्यानंतर, स्वर्गवासियांना सर्वांत मोठी देणगी, अल्लाहच्या प्रसन्नतेच्या स्वरूपात मिळेल. (स.बुखारी व स. मुस्लीम)

يَا أَيُّهَا النَّبِيُّ جَاهِدِ الْكُفَّارَ وَالْمُنَافِقِينَ
وَاغْلُظْ عَلَيْهِمْ ۚ وَمَأْوَاهُمْ جَهَنَّمُ ۖ وَبِئْسَ الْمَصِيرُ ﴿٧٣﴾

हे पैगंबरा! काफिरांशी आणि दांभिकांशी जिहाद चालू ठेवा[१]. आणि त्यांच्यावर सक्ती करा[२]. त्यांची खरी जागा नरकाग्नी आहे; जी फारच वाईट जागा आहे[३] (७३)

يَحْلِفُونَ بِاللَّهِ مَا قَالُوا وَلَقَدْ قَالُوا
كَلِمَةَ الْكُفْرِ وَكَفَرُوا بَعْدَ إِسْلَامِهِمْ وَهَمُّوا
بِمَا لَمْ يَنَالُوا ۚ وَمَا نَقَمُوا إِلَّا أَنْ أَغْنَاهُمُ
اللَّهُ وَرَسُولُهُ مِنْ فَضْلِهِ ۚ فَإِنْ يَتُوبُوا يَكُ
خَيْرًا لَهُمْ ۖ وَإِنْ يَتَوَلَّوْا يُعَذِّبْهُمُ اللَّهُ
عَذَابًا أَلِيمًا فِي الدُّنْيَا وَالْآخِرَةِ ۚ وَمَا لَهُمْ
فِي الْأَرْضِ مِنْ وَلِيٍّ وَلَا نَصِيرٍ ﴿٧٤﴾

हे अल्लाहच्या शपथा वाहून सांगतात की, त्यांनी (असे) म्हटले नाही, वास्तविक खचित्‌च कुफ्रचा बोल त्यांच्या तोंडून निघून चुकला आहे. आणि हे आपल्या इस्लामनंतर, काफिर होऊन गेले आहेत[४]. आणि त्यांनी या कामाचा बेतपण केला, जो त्यांना साधला नाही[५]. हे फक्त या गोष्टीचा बदला घेत आहेत, की, त्यांना अल्लाहने आपल्या कृपेने, आणि त्याच्या पैगंबराने श्रीमंत करून टाकले[६]. जर ते आतासुद्धा तौबा करून घेतील, तर हे त्यांच्यासाठी चांगले आहे; आणि जर तोंड फिरवून राहतील, तर अल्लाहतआला त्यांना इहलोकांत आणि परलोकांत दु:खदायक शिक्षा देईन. आणि साऱ्या पृथ्वीवर त्यांचा कोणी पुरस्कर्ता आणि मददगार होणार नाही. (७४)

وَمِنْهُمْ مَنْ عَاهَدَ اللَّهَ لَئِنْ آتَانَا مِنْ فَضْلِهِ
لَنَصَّدَّقَنَّ وَلَنَكُونَنَّ مِنَ الصَّالِحِينَ ﴿٧٥﴾

यांच्यात ते सुद्धाआहेत, ज्यांनी अल्लाहशी करार केला होता की, जर तो आपल्या कृपेने आम्हास धनदौलत देईन, तर आम्ही दानधर्म करूआणि सदाचरणी लोकांत होऊन राहू. (७५)

فَلَمَّا آتَاهُمْ مِنْ فَضْلِهِ بَخِلُوا بِهِ وَتَوَلَّوْا وَهُمْ
مُعْرِضُونَ ﴿٧٦﴾

परंतु जेव्हा अल्लाहने आपल्या कृपेने, त्यांना दिले तर ते यांत कंजुषी करू लागले; आणि टाळाटाळ करून तोंड फिरवून घेतले[७] (७६)

فَأَعْقَبَهُمْ نِفَاقًا فِي قُلُوبِهِمْ إِلَىٰ يَوْمِ يَلْقَوْنَهُ
بِمَا أَخْلَفُوا اللَّهَ مَا وَعَدُوهُ وَبِمَا كَانُوا يَكْذِبُونَ ﴿٧٧﴾

मग अल्लाहने याच्या शिक्षेत, त्यांच्या मनात दांभिकपणा टाकून दिला, अल्लाहला भेटण्याच्या दिवसापर्यंत; कारण की त्यांनी, अल्लाहशी केलेल्या वायद्याचे विरूद्ध (वर्तन) केले. आणि कारण की खोटे बोलत राहिले (७७)

أَلَمْ يَعْلَمُوا أَنَّ اللَّهَ يَعْلَمُ سِرَّهُمْ وَنَجْوَاهُمْ وَأَنَّ
اللَّهَ عَلَّامُ الْغُيُوبِ ﴿٧٨﴾

काय त्यांना ठाऊक नाही की, अल्लाहतआलाला त्यांच्या मनांतील गुप्तभेद आणि त्यांची कुजबुज सर्व ठाऊक आहे. आणि अल्लाहतआला अदृष्टांच्या सर्व गोष्टीचा ज्ञाता[८] आहे. (७८)

الَّذِينَ يَلْمِزُونَ الْمُطَّوِّعِينَ مِنَ الْمُؤْمِنِينَ فِي
الصَّدَقَاتِ وَالَّذِينَ لَا يَجِدُونَ إِلَّا جُهْدَهُمْ
فَيَسْخَرُونَ مِنْهُمْ ۙ سَخِرَ اللَّهُ مِنْهُمْ وَلَهُمْ
عَذَابٌ أَلِيمٌ ﴿٧٩﴾

जे लोक या मुसलमानांना टोमणे मारतात, जे मनापासून दानधर्म करतात; आणि त्या लोकांची ज्यांना आपल्या मोलमजुरीच्या आणखी काही मिळतच नाही, बस हे त्यांची थट्टा मस्करी करतात[९]; अल्लाहपण त्यांच्याशी थट्टा करतो[१०]; त्यांच्याचकरीता दु:खदायक शिक्षा आहे. (७९)

१) या महावाक्यात नबी करीम ﷺ ला, काफिर आणि मुनाफिक लोकांशी जिहाद आणि त्यांच्यावर सक्ती करण्याचा हुकूम देण्यात येत आहे. नबी ﷺ नंतर, याला संबोधित आपण ﷺ ची उम्मत आहे. काफिरांबरोबर मुनाफिकांशी पण जिहाद करण्याचा जो हुकूम आहे; याच्या बाबतीत मतभेद आहेत. एक मत तर असे आहे की, जर दांभिकांचा दांभिकपणा आणि त्यांची कारस्थाने, उघड होऊन जातील, तर त्यांच्याशी सुद्धा, अशाच प्रकारे जिहाद केले जावे, ज्याप्रमाणे काफिरांशी केले जाते. दुसरे मत हे आहे की, दांभिकांशी जिहाद हे आहे की, त्यांना तोंडी आणि हितोपदेश केला जावा. किंवा त्यांनी चारित्र्य विषयक अपराध केले तर धर्मशास्त्राप्रमाणे शिक्षा (हद्द) दिली जावी. तिसरे मत हे आहे की, जिहादचा हुकूम काफिरांशी संबंधित आहे; आणि सक्ती करण्याचा मुनाफिकांशी; संबंधित आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात की, या मतांमध्ये काही विरोधाभास नाही. यासाठी की, परिस्थिती आणि प्रसंगानुसार, या पैकी कुठल्याही मतावर अंमलबजावणी करणे योग्य आहे.

२) 'गिलज़तन' चा अर्थ सक्ती आणि सामर्थ्याने, शत्रुच्या विरूद्ध पावले उचलणे आहे. केवळ तोंडी सक्ती, अभिप्रेत

नाही. यासाठी की, ते तर नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सद्‌चारित्र्याच्या दयाळू वृत्तीच्याच विरोधात आहेत. याचा आपण ﷺ अंगिकारच करूशकत नव्हते; तसेच अल्लाहतआलाकडून सुद्धा याचा हुकूम आपणास मिळू शकत नव्हता.

३) जिहाद आणि सक्तीच्या हुकूमाचा संबंध या जगाशी आहे. परलोकांत त्यांच्यासाठी नराकाग्नी आहे; जे अत्यंत वाईट ठिकाण आहे.

४) भाष्यकारांनी याच्या भाष्यात, अनेक घटनांचा उल्लेख केला आहे. ज्यात दांभिकांनी रसूलुल्लाह ﷺ च्या बाबतीत उद्धट शब्द उच्चारले. ज्यांना काही मुसलमानांनी ऐकून घेतले; आणि येऊन नबी ﷺ ला सांगून दिले. परंतु आपल्या चौकशी करण्यावर, हांभिकांनी नकार दिला, किंबहुना शपथपण वाहून घेतली की, त्यांनी अशी गोष्ट केलीच नाही. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. याने हे सुद्धा ठाऊक झाले की, नबी ﷺ च्या बाबतीत उद्धटपणा करणे कुफ्र आहे. नबी करीम ﷺ च्या बाबतीत उध्दटपणा करणारा मुसलमान असू शकत नाही.

५) याच्या बाबतीत सुद्धा काही घटना सांगण्यात आल्या आहेत. उदाहरणार्थ, तबूकहून परत येताना, दांभिकांनी रसूलुल्लाह ﷺ च्या विरोधात एक कारस्थान केले, ज्यांत ते यशस्वी होऊ शकले नाहीत. की दहा बारा मुनाफिकीन (दांभिक) एका घाटीत, आपल्यामागे लागून गेले. जेथे रसूलुल्लाह ﷺ, बाकी सैन्यापासून विभक्त, जवळ जवळ एकटे जात होते. त्यांची योजना अशी होती की, आपल्यावर हल्ला करून, आपल्याला संपवून टाकावे. याची सूचना 'वह्य' च्या मार्फत आपणांस देऊन देण्यात आली. ज्यामुळे आपण आपला बचाव करून घेतला.

६) मुसलमानांच्या स्वदेश त्यागानंतर, मदीनेला केंद्राची अवस्था प्राप्त झाली होती. ज्यामुळे तेथे व्यापार आणि व्यवहाराला उर्जितावस्था प्राप्त झाली; आणि मदीनावाल्यांचे राहणीमान फार चांगले होऊन गेले. मदीनेच्या दांभिकांना सुद्धा याच्याने फार फायदा झाला. अल्लाहतआला या महावाक्यात हेच सांगत आहे की, काय ते या गोष्टीवर नाराज आहेत की, अल्लाहने त्यांना आपल्या कृपेने श्रीमंत करून टाकले आहे? म्हणजे ही नाराजी आणि प्रकोपाची तर गोष्ट नाही, किंबहुना त्यांनी अल्लाहचे आभार मानावयांस पाहिजे की, त्याने त्यांना दारीद्र्य आणि तंगीतून काढून, संपन्नावस्थेत पोहचवून दिले.

**मलहुजा** : अल्लाहतआलाच्या बरोबर रसूलुल्लाह् ﷺ चा उल्लेख यासाठी आहे की, या श्रीमंतीचे जाहिरीकरण, रसूलुल्लाह् ﷺ चे व्यक्तीमत्व बनले होते. नाहीतर वास्तविकतेत, श्रीमंत करून देणारा अल्लाहतआलाच होता. अल्लाहने त्यांना आपल्या कृपेने श्रीमंत करून दिले.

७) या महावाक्याला काही भाष्यकारांनी एक सहाबी ह.सालबा बिन हातीब अन्सारी رضي الله عنه च्या बाबतीत ठरविले आहे. परंतु सनदीनुसार हे बरोबर नाही. गोष्ट अशी आहे की, यात सुद्धा मुनाफिकीनचे, एक आणखी कृत्य वर्णन केले गेले आहे.

८) यात त्या दांभिकांकरीता सक्त चेतावणी आहे, जे अल्लाहतआलाशी वायदा करतात, आणि मग त्याची पर्वा करीत नाही. जणूअसे समजतात की, अल्लाहतआला त्यांच्या गुप्त गोष्टींना आणि भेदांना जाणत नाही. वास्तविक पहाता अल्लाहतआला सर्व काही जाणतो. कारण की तो अदृष्टाचा ज्ञाता आहे. अदृष्टाच्या सर्व गोष्टी त्याला ठाऊक आहेत.

९) 'मुत्तव्विईन' चा अर्थ आहे अनिवार्य जकातीशिवाय, आपल्या खुषीने अल्लाहच्या मार्गांत आणखी खर्च करणारे. 'जुहद' चा अर्थ मोल मजुरीचा आहे; म्हणजे ते लोक जे श्रीमंत तर नाहीत, परंतु असे असून सुद्धा, आपल्या मोलमजुरीने कमाविलेल्या थोड्याशा धनाने सुद्धा, अल्लाहच्या मार्गांत खर्च करतात. या महावाक्यात, दांभिकांच्या एका आणखी निंदनीय कामाचा उल्लेख करण्यात येत आहे; की जेव्हा रसूलुल्लाह् ﷺ युद्ध वगैरे प्रसंगी, वर्गणीचे अपील करीत, तर मुसलमान आपल्या अपीलावर 'लब्बैक' म्हणत. आपल्या कुवती नुसार यांत भाग घेत. कोणाजवळ जास्त माल असला तर तो जास्त दानधर्म देई. ज्याच्याजवळ थोडा असे, तो थोडे देई. हे दांभिक दोन्ही प्रकारच्या मुसलमानांना टोमणे मारीत. जास्त देणाऱ्यांच्या बाबतीत म्हणत, की याचा उद्देश लोकांना दाखविणे प्रदर्शन आणि नांव कमाविणे आहे. आणि थोडेसे देणाऱ्यांना म्हणत, तुझ्या या मालाने काय होईल ? किंवा अल्लाहतआला तुझ्या या दानधर्माने निरपेक्ष आहे. (स.बुखारी – १४१५. स. मुस्लिम – ७०६) अशा प्रकारे ते दांभिक मुसलमानांची टिंगल टवाळी करीत, आणि थट्टा करीत.

१०) म्हणजे ईमानवाल्यांच्या टवाळकीचा बदला, त्यांना अशाप्रकारे देतो की, त्यांना अप्रतिष्ठित आणि फजित करतो. किंवा हा शाप आहे की, अल्लाहतआला त्यांच्याशीपण अशाचप्रकारे, टावाळकीचा मामला करो, ज्याप्रमाणे हे मुसलमानांबरोबर टवाळकी करतात. (फत्हुल कदीर)

اِسۡتَغۡفِرۡ لَهُمۡ اَوۡ لَا تَسۡتَغۡفِرۡ لَهُمۡ ؕ اِنۡ تَسۡتَغۡفِرۡ لَهُمۡ سَبۡعِیۡنَ مَرَّةً فَلَنۡ یَّغۡفِرَ اللّٰهُ لَهُمۡ ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمۡ كَفَرُوۡا بِاللّٰهِ وَ رَسُوۡلِهٖ ؕ وَ اللّٰهُ لَا یَهۡدِی الۡقَوۡمَ الۡفٰسِقِیۡنَ ﴿۸۰﴾

यांच्यासाठी आपण क्षमेची प्रार्थना करा अथवा करू नकोस; जर आपण सत्तर वेळा जरी यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना केलीस, तरी अल्लाहतआला त्यांना कधीच क्षमा करणार नाही[१]; हे यासाठी की त्यांनी अल्लाहशी आणि त्याच्या पैगंबराशी कुफ्र केले आहे[२]; अशा आज्ञाभंजक लोकांना, अल्लाहतआला सन्मार्गाची बुद्धी देत नसतो[३]. ८०

فَرِحَ الۡمُخَلَّفُوۡنَ بِمَقۡعَدِهِمۡ خِلٰفَ رَسُوۡلِ اللّٰهِ وَ كَرِهُوۡۤا اَنۡ یُّجَاهِدُوۡا بِاَمۡوَالِهِمۡ وَ اَنۡفُسِهِمۡ فِیۡ سَبِیۡلِ اللّٰهِ وَ قَالُوۡا لَا تَنۡفِرُوۡا فِی الۡحَرِّ ؕ قُلۡ نَارُ جَهَنَّمَ اَشَدُّ حَرًّا ؕ لَوۡ كَانُوۡا یَفۡقَهُوۡنَ ﴿۸۱﴾

मागे राहून जाणारे लोक रसूलुल्लाह (सल्ल) च्या गेल्यानंतर बसून रहाण्यावर खूष आहेत[४]; त्यांनी अल्लाहच्या मार्गांत आपल्या धनाने आणि मनाने, जिहाद करण्याला नापसंत केले आहे; आणि त्यांनी सांगून टाकले की या गरमीत निघू नका; आपण सांगून टाका की, नरकाग्नीची आग फारच सक्त गरम आहे. जर ते समजले असते[५]. ८१

فَلۡیَضۡحَكُوۡا قَلِیۡلًا وَّ لۡیَبۡكُوۡا كَثِیۡرًا ۚ جَزَآءًۢ بِمَا كَانُوۡا یَكۡسِبُوۡنَ ﴿۸۲﴾

बस त्यांना पाहिजे की, त्यांनी कमी हसावे, आणि फार जास्त रडावे[६], या बदल्यांत की ते जे काही करीत होते ८२

فَاِنۡ رَّجَعَكَ اللّٰهُ اِلٰى طَآئِفَةٍ مِّنۡهُمۡ فَاسۡتَاۡذَنُوۡكَ لِلۡخُرُوۡجِ فَقُلۡ لَّنۡ تَخۡرُجُوۡا مَعِیَ اَبَدًا وَّ لَنۡ تُقَاتِلُوۡا مَعِیَ عَدُوًّا ؕ اِنَّكُمۡ رَضِیۡتُمۡ بِالۡقُعُوۡدِ اَوَّلَ مَرَّةٍ فَاقۡعُدُوۡا مَعَ الۡخٰلِفِیۡنَ ﴿۸۳﴾

मग जर अल्लाहतआला आपणास, यांच्या कोण्या समूहाकडे[७] परत नेईल, तर हे आपणाकडे रणांगणात जाण्याची परवानगी मागतील[८]; तेव्हा आपण सांगून टाका की, तुम्ही माझ्या बरोबर कधीच चालू शकत नाही. आणि तसेच तुम्ही माझ्या बरोबर शत्रुंशी लढूशकत नाही. तुम्ही पहिल्यावेळीच बसून रहाण्याला पसंत केले होते[९]; आता तुम्ही, मागे राहून जाणाऱ्यांमध्येच बसून रहा[१०]. ८३

وَ لَا تُصَلِّ عَلٰۤى اَحَدٍ مِّنۡهُمۡ مَّاتَ اَبَدًا وَّ لَا تَقُمۡ عَلٰى قَبۡرِهٖ ؕ اِنَّهُمۡ كَفَرُوۡا بِاللّٰهِ وَ رَسُوۡلِهٖ وَ مَاتُوۡا وَ هُمۡ فٰسِقُوۡنَ ﴿۸۴﴾

यांच्यातून कोणी मृत्यू पावेल, तर आपण त्याच्या जनाजाची नमाज कधीच पढवू नका; आणि त्याच्या कबरेवर उभे राहू नका[११]; हे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे अवज्ञाकारी आहेत; आणि मरेपर्यंत, कुकृत्य करणारे, आज्ञाभंजक राहिले आहेत[१२] ८४

وَ لَا تُعۡجِبۡكَ اَمۡوَالُهُمۡ وَ اَوۡلَادُهُمۡ ؕ اِنَّمَا یُرِیۡدُ اللّٰهُ اَنۡ یُّعَذِّبَهُمۡ بِهَا فِی الدُّنۡیَا وَ تَزۡهَقَ اَنۡفُسُهُمۡ وَ هُمۡ كٰفِرُوۡنَ ﴿۸۵﴾

आपणास यांची संपत्ती आणि संतती काही पण चांगली वाटू नये! अल्लाहची हीच इच्छा आहे की, त्यांना या गोष्टीपासून ऐहिक शिक्षा द्यावी; आणि हे आपले प्राण निघून जाईपर्यंत, काफिरच रहावेत ८५

وَ اِذَاۤ اُنۡزِلَتۡ سُوۡرَةٌ اَنۡ اٰمِنُوۡا بِاللّٰهِ وَ جَاهِدُوۡا مَعَ رَسُوۡلِهِ اسۡتَاۡذَنَكَ اُولُوا الطَّوۡلِ مِنۡهُمۡ وَ قَالُوۡا ذَرۡنَا نَكُنۡ مَّعَ الۡقٰعِدِیۡنَ ﴿۸۶﴾

जेव्हा कधी कुणी अध्याय अवतरीत केला जातो की, अल्लाहवर ईमान आणा, आणि त्याच्या पैगंबराबरोबर मिळून जिहाद करा, तेव्हा यांच्यापैकी, श्रीमंतांचा एक वर्ग, आपल्याजवळ येऊन हे सांगून परवानगी घेऊन घेतो की, आम्हास तर, बसून रहाणाऱ्यांमध्ये सोडून द्या[१३]. ८६

१) सत्तरची संख्या ही अतिशयोक्ती साठी आहे. म्हणजे तूकितीही भरपूर त्यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना करशील, अल्लाहतआला त्यांना कधीच क्षमा करणार नाही. हा अर्थ नाही, की सत्तर पेक्षा जास्त वेळा क्षमा मागण्याने त्यांना क्षमा करून टाकण्यात येईल.

२) हे क्षमा न करण्याच्या सबबीचे वर्णन करून देण्यात आले आहे. कारण की लोक कोणाच्या शिफारशीच्या आशेवर न रहावेत. किंबहुना ईमान आणि सत्कृत्यांचे भांडवल घेऊन अल्लाहच्या दरबारी हजर व्हावे. जर ही परलोकाची शिदोरी, कोणाजवळ नसेल; तर अशा काफिर आणि आज्ञाभंजकांची कोणी शिफारस करणार नाही. अशासाठी की अल्लाहतआला अशा लोकांसाठी शिफारस करण्याची परवानगी देणार नाही.

३) या हिदायतने ती सन्मार्गाची सुबुद्धी, अभिप्रेत आहे, जी माणसाला वांछित ईमानापर्यंत पोहचवून देते. नाहीतर हिदायत, मार्गदर्शनाच्या अर्थांत, म्हणजे मार्गाकडे अंगुली निर्देश; याची व्यवस्था तर इहलोकांत प्रत्येक ईमानवाला आणि काफिरांसाठी करून देण्यांत आली आहे, ''आणि आम्ही त्याला चांगल्या आणि वाईटाचे दोन्ही मार्ग दाखवून दिले

आहे.'' (सू.बलद – १०)
४) हा त्या दांभिकांचा उल्लेख आहे, जे तबूकमध्ये गेले नाहीत. आणि खोट्या सबबी पुढे करून परवानगी मिळवून घेतली. 'खिलाफ' चा अर्थ आहे मागे किंवा विरोध. म्हणजे रसूलुल्लाह ﷺ च्या गेल्यानंतर, आपल्यामागे, किंवा आपल्या विरोधांत मदीनेत बसून राहिले.
५) म्हणजे जर त्यांना याचे ज्ञान असते की, नरकाग्नीच्या आगीच्या गरमीच्या तुलनेत, या जगाची गरमी काहीच नाही; तर ते कधीच मागे राहिले नसते. हदीसमध्ये येते की, जगातली ही आग, नरकाग्नीच्या आगीचा सत्तरवा भाग आहे; म्हणजे नरकाग्नीच्या आगीची तिव्रता, जगांतील आगीच्या ६९ भागांएवढी जास्त आहे. (स.बुखारी) अल्लाहुम्मा अहफजना मिनहा. (आमीन)
६) कलीलन् आणि कसीरन् अर्थ हा आहे की, हे हसतील थोडे, आणि रडतील फार जास्त.
७) दांभिकांचा समूह अभिप्रेत आहे. म्हणजे जर अल्लाहतआला आपणांस सही सलामत, तबूकहून मदीनेला घेऊन येईन, जेथे हे मागे राहून जाणारे दांभिकपण आहेत.
८) म्हणजे आणखी कोण्या युद्धासाठी, बरोबर जाण्याची इच्छा जाहीर करतील.
९) ही पुढील काळांत, बरोबर घेऊन न जाण्याची सबब आहे की, तुम्ही पहिल्या वेळी बरोबर गेले नाहीत, म्हणून आता तुम्ही त्या लायकीचे नाहीत, की तुम्हांस कोणत्याही युद्धात बरोबर घेऊन जावे.
१०) म्हणजे आता तुमची लायकी हीच आहे की, तुम्ही स्त्रिया, मुले आणि म्हाताऱ्यांच्या बरोबरच बसून रहा, जे युद्धात भाग घेण्याऐवजी, घरात बसून राहतात. नबी करीम ﷺ ला ही सूचना यासाठी देण्यात आली, कारण की, त्यांच्या त्या दु:ख व खेदांत आणखी वाढ व्हावी, जो त्यांना मागे राहून गेल्याने झाला होता.
११) हे महावाक्य जरी, दांभिकांचा सरदार, अब्दुल्लाह बिन उबईच्य बाबतीत अवतीर्ण झाले आहे; परंतु याचा हुकूम सार्वत्रिक आहे. प्रत्येक मनुष्य ज्याचा मृत्यू कुफ्र आणि निफाक (दंभ) वर होईल, तो यात शामील आहे. याच्या अवतरण्याची कारणे ही आहेत की, जेव्हा अब्दुल्लाह बिन उबईचा मृत्यू होऊन गेला, त्याचा मुलगा अब्दुल्लाह (जे मुसलमान आणि बापाच्याच नावावर होते. एकाच नांवाचे) रसूलुल्लाह् ﷺ च्या सेवेत हजर झाले, आणि म्हणाले, एक तर आपण (बरकतवाला म्हणून) आपला सदरा देऊन टाकावा की त्यांत मी माझ्या बापाला कफन द्यावे. दुसरे आपण त्याची जनाजाची नमाज पढवून द्यावी. आपण ﷺ नी सदरापण देऊन टाकला; आणि जनाज्याची नमाज पढविण्यासाठी गेलेत. ह.उमर ؓ नी आपणास सांगितले की, अल्लाहतआलाने तर आपणास अशा लोकांच्या जनाज्याची नमाज पढण्यापासून मना केले आहे. आपण का त्याच्यासाठी क्षमेची प्रार्थना करता? आपण ﷺ नी फर्मावीले, ''अल्लाहतआलाने मला अधिकार दिला आहे.'' म्हणजे मना केले नाही. अल्लाहतआलाने म्हटले आहे की जर तू सत्तर वेळा जरी त्यांच्यासाठी क्षमा याचना करशील, तरी अल्लाहतआला त्यांना माफ करणार नाही. तर मग मी, सत्तरपेक्षा जास्त, त्यांच्यासाठी क्षमा याचना करून घेईल'' म्हणून आपण ﷺ नी जनाज्याची नमाज पढवून दिली. ज्यावर अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत करून, पुढील काळांत, दांभिकांच्या बाबतीत, क्षमायाचनेची प्रार्थना करण्यास संपूर्ण बंदी करून टाकली. (स.बुखारी तफसीर सू.बराअत आणि स. मुस्लिम)
१२) हे जनाज्याची नमाज, आणि क्षमा याचना न करण्याचे कारण आहे. ज्याचा अर्थ हा आहे की, ज्या लोकांचा शेवट कुफ्र आणि आज्ञाभंगावर होईल, त्यांची नमाजे जनाजा पढली जाऊ नये आणि त्यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना केली जाऊ नये. एका हदीसमध्ये तर येथपर्यंत येते की, जेव्हा नबी ﷺ , कबरस्तानांत पोहचले, तेव्हा ठाऊक झाले की, अब्दुल्लाह् बिन उबईला, दफन करून टाकण्यांत आले आहे. तथापि आपण ﷺ नी त्याला कबरीतून काढविले, आणि आपल्या गुढघ्यांवर ठेवून त्यावर आपले थुंक, थुंकले. आपण आपला सदरा त्याला घातला. (स.बुखारी व स. मुस्लिम) ज्याने ठाऊक झाले की जो ईमानापासून वंचित झाला असेल त्याला जगातील मोठ्यात मोठ्या व्यक्तीची क्षमायाचना आणि त्याची शिफारस पण त्याला काही फायदा पोहचवूशकणार नाही.
१३) हा त्याच मुनाफिकीन चा उल्लेख आहे, ज्यांनी बहाणे बनवून मागे रहाणे पसंत केले, 'उलुत्तवले' ने अभिप्रेत संपन्न व श्रीमंत वर्ग, म्हणजे या वर्गाला मागे तर न रहावयास पाहिजे होते; कारण की त्यांच्याजवळ अल्लाहचे दिलेले सर्व काही होते, 'काईदीन' ने अभिप्रेत काही कारणामुळे घरांत बसून राहणारे लोक आहेत; जसे की त्यांच्यासाठी पुढील महावाक्यात, 'खवालिफ्' चा शब्द वापरण्यांत आला आहे. जे 'खालीफतून' चे अनेकवचन आहे; म्हणजे मागे रहाणाऱ्या स्त्रिया.

رَضُوا بِأَنْ يَّكُوْنُوْا مَعَ الْخَوَالِفِ وَطُبِعَ عَلٰى قُلُوْبِهِمْ فَهُمْ لَا يَفْقَهُوْنَ ﴿٨٧﴾

हे तर घरांत बसून राहणाऱ्या स्त्रियांच्या साथ देण्यावर खूष झाले; आणि त्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून देण्यात आली; आता ते काही समज अक्कल बाळगत नाहीत[१] ८७

لٰكِنِ الرَّسُوْلُ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا مَعَهٗ جٰهَدُوْا بِاَمْوَالِهِمْ وَاَنْفُسِهِمْ ؕ وَاُولٰٓئِكَ لَهُمُ الْخَيْرٰتُ ۫ وَاُولٰٓئِكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ﴿٨٨﴾

परंतु स्वत: पैगंबर आणि त्यांच्या संगतीत असलेले ईमानवाले, आपल्या धनाने आणि प्राणाने, जिहाद करीत आहेत. हेच लोक भलाईवाले आहेत; आणि हेच लोक सफलता मिळवणारे आहेत. ८८

اَعَدَّ اللّٰهُ لَهُمْ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ ذٰلِكَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ﴿٨٩﴾

त्यांच्याचसाठी अल्लाहने त्या स्वर्गाच्या बागा तयार केल्या आहेत, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात आहेत; ज्यात हे नित्य निरंतर रहाणार आहेत; हेच फार मोठे साफल्य आहे[२]. ८९

وَجَآءَ الْمُعَذِّرُوْنَ مِنَ الْاَعْرَابِ لِيُؤْذَنَ لَهُمْ وَقَعَدَ الَّذِيْنَ كَذَبُوا اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ ؕ سَيُصِيْبُ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٩٠﴾

ग्रामिण लोकांतून निमित्तवाले लोक हजर झाले की, त्यांना परवानगी देऊन दिली जावी, आणि त्यांनी बसून राहिले ज्यांनी अल्लाहशी आणि त्याच्या पैगंबराशी खोट्या गोष्टी बनविल्या होत्या. आतातर त्यांच्यात जितके काफिर आहेत, त्यांना दु:ख दायक शिक्षा पोहचूनच राहील[३]. ९०

لَيْسَ عَلَى الضُّعَفَآءِ وَلَا عَلَى الْمَرْضٰى وَلَا عَلَى الَّذِيْنَ لَا يَجِدُوْنَ مَا يُنْفِقُوْنَ حَرَجٌ اِذَا نَصَحُوْا لِلّٰهِ وَرَسُوْلِهٖ ؕ مَا عَلَى الْمُحْسِنِيْنَ مِنْ سَبِيْلٍ ؕ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٩١﴾

दुर्बल, वृद्धावर आणि आजाऱ्यावर आणि त्यांच्यावर, ज्यांच्याजवळ खर्च करण्यासाठी काही पण नाही, त्यांच्यावर काही सक्ती नाही, या अटीवर की ते अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे भले इच्छित असावे; अशा सुकृत्य करणाऱ्यांवर दोष लावण्यास काहीही मार्ग नाही; अल्लाहतआला मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे[४] ९१

وَّلَا عَلَى الَّذِيْنَ اِذَا مَآ اَتَوْكَ لِتَحْمِلَهُمْ قُلْتَ لَآ اَجِدُ مَآ اَحْمِلُكُمْ عَلَيْهِ ۪ تَوَلَّوْا وَّاَعْيُنُهُمْ تَفِيْضُ مِنَ الدَّمْعِ حَزَنًا اَلَّا يَجِدُوْا مَا يُنْفِقُوْنَ ﴿٩٢﴾

होय, त्यांच्यावर सुद्धा काही सक्ती नाही, जे आपल्याजवळ येतात, की आपण त्यांच्यासाठी स्वारीची व्यवस्था करून दयावी. तेव्हाआपण उत्तर देतात की, मला तर तुमच्या स्वारीसाठी काही आढळत नाही. तेव्हा ते दु:खाने आपल्या डोळ्यातून अश्रू गाळत परत जातात की, त्यांना खर्च करण्यासाठी काहीच प्राप्त[५] होत नाही. ९२

اِنَّمَا السَّبِيْلُ عَلَى الَّذِيْنَ يَسْتَاْذِنُوْنَكَ وَهُمْ اَغْنِيَآءُ ۚ رَضُوْا بِاَنْ يَّكُوْنُوْا مَعَ الْخَوَالِفِ ۙ وَطَبَعَ اللّٰهُ عَلٰى قُلُوْبِهِمْ فَهُمْ لَا يَعْلَمُوْنَ ﴿٩٣﴾

नि:संशय त्या लोकांवर तर दोषारोपण करण्यालामार्ग आहे, आणि त्यांच्यावरच आहे, जे श्रीमंत असून सुद्धा आपल्याजवळ (मागे राहून जाण्याची) परवानगी मागतात. हे घरात असून रहाणाऱ्या स्त्रियांचा साथ देण्यावर खूष आहेत. आणि त्यांच्या अंत:करणावर, अल्लाहची मोहोर लागून चुकली आहे; ज्यामुळे ते निव्वळ नासमज होऊन गेले आहेत[६]. ९३

१) अंत:करणावर मोहोर लागून जाणे. हा नित्य सतत गुन्हे करण्याचा परिणाम असतो. ज्याचा खुलासा पूर्वी केला जाऊन चुकला आहे. याच्या नंतर, मनुष्य विचार करण्याची आणि समजण्याची क्षमता घालवून बसतो.

२) या ढांभिकांच्या उलट, ईमानवाल्यांची वर्तणूक ही आहे की, आपल्या तन मन धनाने अल्लाहच्या मार्गात न त्यांना आपल्या जिवाची पर्वा आहे न धनाची. यांच्याजवळ अल्लाहची आज्ञा सर्वांवर वरच्या दर्जाची आहे. त्यांच्याच करता भलाई आहे. म्हणजे परलोकातील भलाई आणि स्वर्गातील ढेणग्या आणि काहींजवळ धर्म आणि इहलोकांचे फायदे आणि हेच लोक यशस्वी आणि मोठ्या साफल्याचे धनी होतील.

३) या 'मुअज्ज़िरीन' बाबतीत भाष्य कारांमध्ये मतभेद आहेत. काहींच्या जवळ हे शहरापासून दूर राहणारे, ते

अरबातील गावंढळ आहेत, ज्यांनी खोट्या सबबी पुढे करून, परवानगी मिळवली. दुसरा प्रकार त्यांच्यात तो होता, ज्यांनी येऊन सबबी पुढे करण्याची आवश्यकतापण समजली नाही,आणि बसून राहिले. अशाप्रकारे जणू या महावाक्यात दांभिकांच्या दोन समूहांची चर्चा आहे. आणि मोठ्या शिक्षेच्या धमकावणीत दोन्ही शामील आहेत. आणि 'मिनहुम' ने खोट्या सबबी पुढे करणारे, आणि बसून रहाणारे, दोन्ही अभिप्रेत असतील. आणि दुसऱ्या भाष्यकारांनी 'मुअज्‌जिरून' ने अभिप्रेत असे बनवासी मुसलमान घेतले आहेत, ज्यांनी योग्य सबब पुढे करून, परवानगी घेतली होती. या अनुषंगाने महावाक्याच्या पुढच्या वाक्यात दांभिकांची चर्चा आहे; आणि महावाक्यात दोन समूहांचा उल्लेख आहे. पहिल्या महावाक्यात त्या मुसलमानांचा, ज्यांच्याजवळ खरोखर काही सबबी होत्या; आणि दुसरे दांभिक, काही सबबी पुढे केल्याशिवाय, बसून राहिलेत; आणि महावाक्याच्या शेवटच्या भागांत जी धमकी आहे, या दुसऱ्या समूहासाठी आहे. वल्लाह् अअ्‌लम!

४) या महावाक्यांत, त्या लोकांची चर्चा आहे, जे खरोखर लाचार होते, आणि त्यांची सबबपण यथायोग्य होती. उदाहरणार्थ वृद्ध आणि दुर्बळ, म्हणजे म्हाताऱ्या प्रकारचे लोक, आणि आंधळे व पांगळे वगैरे. अपंगपण याच वर्गात मोडतात. काहींनी यांना आजाऱ्यांत जमा केले आहे. २)आजारी ३) आणि ज्यांच्या धर्मयुद्धाचे खर्च नव्हते; आणि बैतुल माल सुद्धा त्याचे खर्च पूर्ण करण्याला सक्षम नव्हता. अल्लाह व रसूलच्या हितचिंतनाने अभिप्रेत आहे, जिहादची यांच्या मनात व्याकुळता आहे (किंवा स्फूर्ती आहे.) जिहादमध्ये भाग घेणाऱ्यासाठी प्रेम बाळगतात. आणि अल्लाह व रसूलच्या शत्रुंशी वैर आणि यथाशक्ती अल्लाह व रसूलच्या हुकूमांचे आज्ञापालन करतात. असे सदाचरणी जर जिहादमध्ये भाग घेण्यापासून जर लाचार असतील, तर त्यांच्यावर काही पाप नाही.

५) हा मुसलमानांच्या एका दुसऱ्या समूहाचा उल्लेख आहे. ज्यांच्याजवळ आपल्या स्वाऱ्यापण नव्हत्या. आणि नबी ﷺ नी पण, त्यांना स्वाऱ्या पुरविण्यात असमर्थता दर्शविली. ज्यावर त्यांना एवढे दु:ख झाले की, आपोआप त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. रजी अल्लाहु अ्‌नहुम - जणू खरे खुरे मुसलमान, जे कुठल्याही दृष्टीकोनातून योग्य कारण बाळगत होते, अल्लाहतआलाने जो प्रत्येक उघड आणि गुप्त गोष्टीशी वाकबगार आहे, त्यांना जिहादमधून वगळून टाकले. किंबहुना हदीसमध्ये येते की, नबी ﷺ नी त्या लाचार लोकांच्या बाबतीत, जिहादमध्ये शामील झालेल्या लोकांना फर्माविले की, ''तुमच्या मागे मदीनेत काही लोक असेपण आहेत, की तुम्ही ज्या पण दरीला पार करतात, आणि ज्यापण रस्त्यावर चालतात, तुमच्या बरोबर ते सुद्धा पुण्यप्रतिफलात बरोबरीचे भागीदार आहेत.'' सहाबा कराम ﷺ नी विचारले, हे कसे काय होऊ शकते? जेव्हा की ते मदीनेत बसलेले आहेत? आपण ﷺ नी फर्माविले, ''सबबीने त्यांना तेथे थांबविले आहे.'' (स.बुखारी व स.मुस्लीम)

६) हे दांभिक आहेत, ज्यांची चर्चा आ.८६, ८७ मध्ये येऊन चुकली. येथे दुसऱ्यांदा त्यांचा उल्लेख खऱ्या मुसलमानांच्या तुलनेत झाला आहे की, ''वस्तूआपल्या विरुद्ध (प्रतिस्पर्धी) ने चांगल्या ओळखल्या जातात.'' 'खवालीफ', 'खालिफतून' चे अनेकवचन आहे. (मागे रहाणारे) पुरूष, स्त्रिया, मुले, अपंग आणि सक्त आजारी आणि म्हातारे आहेत; जे युद्धात सहभागी होण्यांस लाचार आहेत. 'ला याअलमून' चा अर्थ आहे त्यांना ठाऊक नाही की, मागे राहून जाणे, किती मोठा अपराध आहे. नाहीतर कदाचित ते रसूल ﷺ च्या मागे राहिले नसते.

يَعْتَذِرُونَ إِلَيْكُمْ إِذَا رَجَعْتُمْ إِلَيْهِمْ ۚ قُل لَّا تَعْتَذِرُوا لَن نُّؤْمِنَ لَكُمْ قَدْ نَبَّأَنَا اللَّهُ مِنْ أَخْبَارِكُمْ ۚ وَسَيَرَى اللَّهُ عَمَلَكُمْ وَرَسُولُهُ ثُمَّ تُرَدُّونَ إِلَىٰ عَالِمِ الْغَيْبِ وَالشَّهَادَةِ فَيُنَبِّئُكُم بِمَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿٩٤﴾

हे लोक, तुमच्यासमोर सबबी सांगतील, जेव्हा तुम्ही त्यांच्याजवळ परत जाल; आपण सांगून टाका की, सबबी पुढे करू नका, आम्ही तुम्हास कधीच खरे समजणार नाही; अल्लाहतआला आम्हास तुमची बातमी देऊन चुकला आहे; आणि पुढे सुद्धा, अल्लाह आणि त्याचा पैगंबर तुमची कृत्ये पाहील. मग तुम्ही अशाकडे परत पाठवले जाल, जो गुप्त आणि उघड सर्व जाणणारा आहे. मग तो तुम्हास सांगून देईल, जे काही तुम्ही करीत होता. ९४

سَيَحْلِفُونَ بِاللَّهِ لَكُمْ إِذَا انقَلَبْتُمْ إِلَيْهِمْ لِتُعْرِضُوا عَنْهُمْ ۖ فَأَعْرِضُوا عَنْهُمْ ۖ إِنَّهُمْ رِجْسٌ ۖ وَمَأْوَاهُمْ جَهَنَّمُ جَزَاءً بِمَا كَانُوا يَكْسِبُونَ ﴿٩٥﴾

होय! ते आता तुमच्यासमोर अल्लाहच्या शपथा वाहतील, जेव्हा तुम्ही त्यांच्या जवळ परत जाल; कारण की तुम्ही त्यांना त्यांच्या स्थितीवर सोडून द्यावे. म्हणून तुम्ही त्यांना त्यांच्या स्थितीवर सोडून द्या. ते लोक फार घाणेरडे आहेत. आणि त्यांचे ठिकाण नरकाग्नी आहे, त्या कामांच्या बदल्यांत ज्यांना ते करीत होते. ९५

يَحْلِفُونَ لَكُمْ لِتَرْضَوْا عَنْهُمْ ۖ فَإِن تَرْضَوْا عَنْهُمْ فَإِنَّ اللَّهَ لَا يَرْضَىٰ عَنِ الْقَوْمِ الْفَاسِقِينَ ﴿٩٦﴾

हे यासाठी शपथा वाहतील की, तुम्ही त्यांच्याशी राजी होऊन जावे. म्हणून जर तुम्ही त्यांच्याशी राजीपण होऊन जाल, तर अल्लाहतआला अशा गुन्हेगार लोकांशी राजी होत नसतो[१]. ९६

الْأَعْرَابُ أَشَدُّ كُفْرًا وَنِفَاقًا وَأَجْدَرُ أَلَّا يَعْلَمُوا حُدُودَ مَا أَنزَلَ اللَّهُ عَلَىٰ رَسُولِهِ ۗ وَاللَّهُ عَلِيمٌ حَكِيمٌ ﴿٩٧﴾

ग्रामीण लोक कुफ्र आणि दांभिकपणांत फारच सक्त आहेत[२]. आणि त्यांना असे व्हावयास पण पाहिजे की, त्यांना त्या आदेशांचे ज्ञान नसावे, जे अल्लाहतआलाने आपल्या पैगंबरावर अवतरीत केले आहेत[३]. आणि अल्लाह मोठा ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. ९७

وَمِنَ الْأَعْرَابِ مَن يَتَّخِذُ مَا يُنفِقُ مَغْرَمًا وَيَتَرَبَّصُ بِكُمُ الدَّوَائِرَ ۚ عَلَيْهِمْ دَائِرَةُ السَّوْءِ ۗ وَاللَّهُ سَمِيعٌ عَلِيمٌ ﴿٩٨﴾

आणि या ग्रामिणांमधून काही असे आहेत की, जे काही[४] खर्च करतात, त्याला मुर्दड समजतात;[५] आणि तुम्ही मुसलमानांसाठी कालचक्राची वाट[६] पहातात, वाईट काल, त्यांच्यावरच येणार आहे[७]. आणि अल्लाह ऐकणारा आणि जाणणारा आहे. ९८

وَمِنَ الْأَعْرَابِ مَن يُؤْمِنُ بِاللَّهِ وَالْيَوْمِ الْآخِرِ وَيَتَّخِذُ مَا يُنفِقُ قُرُبَاتٍ عِندَ اللَّهِ وَصَلَوَاتِ الرَّسُولِ ۚ أَلَا إِنَّهَا قُرْبَةٌ لَّهُمْ ۚ سَيُدْخِلُهُمُ اللَّهُ فِي رَحْمَتِهِ ۗ إِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿٩٩﴾

आणि काही गांवातल्या लोकातून असेपण आहेत, जे अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर ईमान ठेवतात. जो काही खर्च करतात त्याला, अल्लाहचे सामिप्य प्राप्त करण्याचे साधन आणि पैगंबराच्या दुआचे साधन बनवतात[८]. लक्षांत ठेवा, की त्यांचे हे खर्च करणे, नि:संशय त्यांच्याकरीता, (अल्लाहच्या) सामिप्याला कारणीभूत आहे. यांना अल्लाहतआला अवश्य आपल्या दयेत दाखल करून घेईन[९]. अल्लाहतआला फारच मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ९९

१) या तीन महावाक्यात, त्या दांभिकांचा उल्लेख आहे, जे तबूकच्या प्रवासात मुसलमानांबरोबर गेले नव्हते. नबी ﷺ आणि मुसलमानांच्या सकुशल परतीनंतर, आपल्या सबबी पुढे करून, त्यांच्या दृष्टीत प्रामाणिक बनू इच्छित होते. अल्लाहतआलाने फर्माविले, जेव्हा तुम्ही त्यांच्या जवळ याल, तेव्हा हे सबबी पुढे करतील; तुम्ही त्यांना सांगून टाका की, आमच्या समोर सबबी पुढे करण्याची आवश्यकता नाही. यासाठी की अल्लाहतआलाने तुमच्या खऱ्या परिस्थितीची आम्हाला जाणीव करून दिली आहे. आता तुमच्या खोट्या सबबीचा आम्ही कशाप्रकारे भरोसा करावा? तथापि या सबबीची वास्तविकता नजीकच्या भविष्यकाळांत आणखी स्पष्ट होऊन जाईल. तुमचे कर्म तर तसे अल्लाहपण पहात आहे. आणि पैगंबराची पण त्यावर नजर आहे. तुमच्या सबबीच्या हकिकतीला स्वत:च उघड करून देईल. आणि जर तुम्ही रसूलुल्लाह ﷺ व मुसलमानांना पुन्हा सुद्धा धोका आणि गैर समजूत करून देण्यात यशस्वी राहिले; तर शेवटी एक वेळ असा येईलच, जेव्हा तुम्ही अशा व्यक्तीमत्त्वाच्या दरबारात हजर केले जाल, जे उघड आणि

गुप्त (सर्व प्रकराच्या) प्रत्येक गोष्टीला फार चांगल्या प्रकारे जाणते. त्याला तर तुम्ही कुठल्याही प्रकारे धोका देऊ शकत नाहीत. तो अल्लाह तुमचा सर्व खरा खुरा अहवाल तुमच्यासमोर उघडून ठेवून देईन. दुसऱ्या महावाक्यात फर्माविले की, तुमच्या परत आल्यावर हे शपथा वाहतील; कारण की तुम्ही त्यांना माफ करावे. बस! तुम्ही त्यांना त्यांच्या स्थितीवर सोडून द्या. हे लोक आपल्या श्रद्धा आणि कर्माच्या दृष्टीने घाणेरडे आहेत. त्यांनी जे काही केले आहे, त्याचा बदला नरकाग्नीच आहे. तिसऱ्या महावाक्यात फर्माविले, हे तुम्हाला राजी करण्यासाठी, शपथा वाहतील, परंतु या मूर्खांना हे ठाऊक नाही, जरी तुम्ही त्यांच्याशी राजी होऊन पण जाल, तरी त्यांनी ज्या आज्ञाभंगाचा म्हणजे अल्लाहच्या आज्ञापालनापासून पळ काढण्याचा जो मार्ग अंगीकारला आहे, असे असतांना, अल्लाहतआला त्यांचेशी कसा राजी होऊ शकतो?

२) चर्चित महावाक्यांमध्ये, त्या दांभिकांची चर्चा होती, जे मदीना शहरात वस्ती करून होते. आणि काही दांभिक ते पण होते, जे जंगलात रहाणारे, म्हणजे मदीनेच्या बाहेर, गांवात रहात होते. गांवातल्या या राहाणाऱ्यांना, 'अअराब' म्हटले जाते; जे 'अअराबी' चे अनेकवचन आहे. शहरवासियांच्या चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या तुलनेत, ज्याप्रमाणे त्यांच्या चारित्र्य आणि कर्तृत्वात, सक्ती आणि दयाळू शून्यता, जास्त आढळून येते. याचप्रमाणे जे काफिर आणि दांभिक होते, ते कुफ्र आणि दांभिकपणांत सुद्धा शहरवासियांपेक्षा जास्त सक्त आणि धर्मशास्त्राच्या आदेशांकडून जास्त अनभिज्ञ होते. या वाक्यात त्यांचीच चर्चा आणि त्यांच्या याच कर्तृत्वाचा खुलासा आहे. काही हदीशींनी सुद्धा त्यांच्या कर्तृत्वावर प्रकाश टाकला आहे. उदाहरणार्थ एका प्रसंगी काही अअराबी, रसूलुल्लाह् ﷺ च्या सेवेत हजर झाले, आणि त्यांनी विचारले, ''काय तुम्ही आपल्या मुलांचा मुका घेतात?'' सहाबांनी सांगितले, 'होय', त्यांनी सांगितले ''वल्लाह्! आम्ही तर मुका घेत नाही.'' रसूलुल्लाह् ﷺ ने हे ऐकून सांगितले, ''जर अल्लाहने तुमच्या अंत:करणांतून दया आणि कनवाळू वृत्तीची भावना काढून टाकली आहे, तर त्याला मी काय करू शकतो?'' (स.बुखारी . स.मुस्लीम ...)

३) याचे कारण हे आहे की, कारण की ते शहरापासून दूर रहातात; आणि अल्लाह व रसूलच्या गोष्टी ऐकण्याचा योग त्यांना प्राप्त होत नाही.

४) आता त्या ग्रामिणांचे दोन प्रकार वर्णन करण्यात येत आहे. हा पहिला प्रकार आहे.

५) 'मगरमा' भुरदंडाला म्हणतात; म्हणजे खर्च जो माणसाला, अत्यंत नावडीने लाचार होऊन करावा लागतो.

६) 'दवाअिर' 'दाईरतून' चे अनेकवचन आहे. वाईट काळ म्हणजे त्रास आणि कष्टाचा जमाना, म्हणजे याची ते वाट पाहातात की मुसलमान कालचक्रात म्हणजे संकटांचे बळी व्हावेत.

७) हा शाप आहे की, कालचक्र त्यांच्यावरच पडावे. कारण तेच त्याला पात्र आहेत.

८) हा अअराबचा दुसरा प्रकार आहे. ज्यांना अल्लाहतआलाने शहरापासून दूर राहाण्यावर सुद्धा, अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर ईमान आणण्याची सुबुद्धी दिली. आणि या ईमानामुळे त्यांचे ते अज्ञानपण दूर करून दिले, जे वनांत राहिल्यामुळे, वनवासी मध्ये सर्व साधारणपणे आढळून येते. म्हणून ते अल्लाहच्या मार्गांत खर्च केलेल्या धनाला भुरदंड समजण्याऐवजी, अल्लाहच्या सामिप्याचा आणि पैगंबरांच्या दुवा घेण्याचे साधन समजतात. हा इशारा आहे, रसूलुल्लाह ﷺ च्या कर्म पद्धतीकडे जो दानधर्म देणाऱ्यांच्या बाबतीत, आपली होती. म्हणजे आपण त्यांच्या करता भलाईच्या दुआ करीत. ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते की एक सदका (जकात, इनफाक दानधर्म वगैरे) आणणाऱ्यांसाठी आपण ﷺ नी दुआ दिली, ''हे अल्लाह! अबी अवफाच्या बालबच्च्यांवर रहमतची वर्षा कर.'' (स.बुखारी स.मुस्लीम)

९) ही खुषखबर आहे की, अल्लाहचे सामिप्य त्यांना प्राप्त आहे; आणि अल्लाहच्या दयेला ते पात्र आहेत.

وَالسّٰبِقُوْنَ الْاَوَّلُوْنَ مِنَ الْمُهٰجِرِيْنَ وَالْاَنْصَارِ وَالَّذِيْنَ اتَّبَعُوْهُمْ بِاِحْسَانٍ ۙ رَّضِيَ اللّٰهُ عَنْهُمْ وَرَضُوْا عَنْهُ وَاَعَدَّ لَهُمْ جَنّٰتٍ تَجْرِيْ تَحْتَهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ۗ ذٰلِكَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ﴿١٠٠﴾

**आणि जे स्वदेश त्याग करणारे आणि जे त्यांना मदत करणारे, अग्रगण्य आणि पुढे सरसावले, आणि ज्यांनी प्रांजळपणे त्यांचे अनुकरण केले[१]; अल्लाह त्या सर्वांशी संतुष्ट झाला; आणि ते सर्व त्याच्याशी संतुष्ट झाले; आणि अल्लाहने त्यांच्यासाठी असे बाग तयार करून ठेवले आहेत, ज्यांच्याखालून पाण्याचे पाट वाहत असतील; ज्यांच्यांत ते नेहमी राहतील[२]. हे मोठेच साफल्य आहे. (१००)**

وَمِمَّنْ حَوْلَكُمْ مِّنَ الْاَعْرَابِ مُنٰفِقُوْنَ ۛ وَمِنْ اَهْلِ الْمَدِيْنَةِ ۛ مَرَدُوْا عَلَى النِّفَاقِ ۟ لَا تَعْلَمُهُمْ ۭ نَحْنُ نَعْلَمُهُمْ ۭ سَنُعَذِّبُهُمْ مَّرَّتَيْنِ ثُمَّ يُرَدُّوْنَ اِلٰى عَذَابٍ عَظِيْمٍ ﴿١٠١﴾

**आणि काही तुमच्या आसपासवाल्यांमध्ये, आणि काही मदीनावाल्यांमधून, असे दांभिक आहेत की, जे दांभिकपणावर अडलेले आहेत[३] . आपण त्यांना जाणत नाही[४]. आम्ही आपण त्यांना (खूप) जाणतो. आम्ही त्यांना दुप्पट शिक्षा देऊ, मग[५] ते मोठ्या सक्त शिक्षेकडे पालटले जातील. (१०१)**

१)याच्यांत तीन समूहांचा उल्लेख आहे. एक स्वदेशत्याग करणाऱ्यांचा, ज्यांनी धर्मासाठी, अल्लाह व रसूलच्या आज्ञेवर, मक्का आणि दुसऱ्या इलाख्यांतून हिजरत केली. आणि सर्व कांही सोडून, मदीनेला आले. दुसरे अन्सार, जे मदिनेचे राहणारे होते.यांनी प्रत्येक प्रसंगी, रसूलुल्लाह ﷺ ची मदत , आणि संरक्षण केले. आणि मदीनेला येणाऱ्या मुहाजिरीन चे सुध्दा खूप, हसतमुखाने स्वागत केले. आणि आपले सर्व कांही त्यांच्या सेवेत हजर करून दिले. येथे त्या दोन्ही समूहांच्या प्रथम पुढाकार घेणाऱ्यांचा उल्लेख केलेला आहे. म्हणजे दोन्ही समूहांतून त्या व्यक्ती ज्यांनी इस्लाम कबूल करण्यात सर्वांत आधी पुढाकार घेतला. याच्या व्याख्येत मतभेद आहेत. काहींच्या जवळ साबेकून अव्वलून (प्रथम पुढाकार घेणारे) ते आहेत, ज्यांनी दोन किबल्यांकडे तोंड करून नमाज पढली. म्हणजे किबला बदल होण्यापूर्वी, मुसलमान होणारे मुहाजिरीन आणि अन्सार. कांहीजवळ हे ते सहाबा आहेत, जे हुदैबियामध्ये 'बैअते रिजवान' मध्ये हजर होते. कांहीच्याजवळ, हे बद्रवाले आहेत. इमाम शौकानी म्हणतात की, हे सर्वपण अभिप्रेत होऊ शकतात. तिसरा प्रकार तो आहे, जे या मुहाजिरीन आणि अन्सारच्या प्रांजलपणा आणि भलेपणा बरोबर अनुकरण करणारे आहेत. या समूहाने अभिप्रेत ताबेईन आहेत; ज्यांनी नबी ﷺ ना पाहिले नाही, परंतु सहाबा करामच्या सोबतीत राहिले. आणि कांहीनी त्याला सर्व साधारण ठेवले आहे; म्हणजे कयामत पर्यंत जितके पण, अन्सार आणि मुहाजिरीनशी प्रेम बाळगणारे, आणि त्यांच्या पाऊल खुणांवर चालणारे मुसलमान आहेत, ते यात शामील आहेत. यांच्यात इसतलाही ताबेईन पण येऊन जातात.

२) अल्लाहतआला त्यांचेशी संतुष्ठ होऊन गेला, चा अर्थ आहे अल्लाहतआलाने त्यांची पुण्यकर्मे मान्य करून घेतली; त्यांच्या मानवी चुकांना क्षमा करुन टाकले आणि तो यांच्यावर अप्रसन्न नाही. कारण की जर असे नसते, तर त्यांच्यासाठी स्वर्ग आणि स्वर्गाच्या देणग्यांची खुषखबर का दिली गेली? जी या महावाक्यात दिली गेली आहे. याच्याने हे पण माहित झाले की, ही अल्लाह्ची प्रसन्नता, वेळेपुरती आणि तात्कालीक नाही,परंतु नेहमीसाठी आहे. जर रसूलुल्लाह ﷺ च्या नंतर सहाबा करामने, इस्लाम कडून फिरून जाणे होते, (जशी की एका द्वेषाने भारीत झालेल्या एका टोळीची श्रध्दा आहे.) तर अल्लाहतआला त्यांना स्वर्गाची शुभ सूचना न देता. याच्याने हे पण ठाऊक झाले की, जेव्हा अल्लाहने यांच्या सर्व चुका क्षमा करून टाकल्या, तर आता उपहास आणि टिका म्हणून त्यांच्या कोताईची चर्चा करणे, कोण्या मुसलमानाच्या शानला योग्य नाही. तसेच हे पण ठाऊक झाले की, त्यांचे प्रेम आणि अनुकरण अल्लाहच्या प्रसन्नतेचे साधन आहे; आणि त्यांच्याशी शत्रुत्त्व आणि द्वेष आणि तिरस्कार, अल्लाहच्या सुप्रसन्नतेपासून वंचित होण्याला कारणीभूत आहे. ''फ अय्युल फरिकैनी, अहक्कु बिल अमनी इन् कुंतुम तअ्लमून'' ( सू. अनआम - ८१) ''तर (प्रेम आणि शत्रूत्त्व ठेवणारे) दोनही समूहापैकी शांततेचा कोण अधिक हक्कदार आहे. ज र तुम्हास याचे ज्ञान असेल.''

३) 'मरद' आणि 'तमर्रद' चा अर्थ आहे नम्रता, सौम्यता (गुळगुळीत पणा) आणि 'तजर्रुत'. म्हणून त्या फांदीला जिला पाने नसावीत, तो घोडा जो केसांशिवाय असावा, तो मुलगा ज्याच्या चेहऱ्यावर केस नसावेत, या सर्वांना, 'अम्रद्' म्हटले जाते; 'मरदु अलन् निफाक' चा अर्थ होईल, 'तजर्रदु अलन् निफाक' जणू त्यांनी दांभिकपणासाठी, आपल्या स्वत:ला केवळ आणि एकटे करून घेतले. म्हणजे यावर त्यांचे अडून राहणे आणि टिकून रहाणे आहे.

४) किती स्पष्ट शब्दांत, नबी ﷺ कडून अदृष्टाच्या ज्ञानाचा इनकार आहे. जर बिदअतवाल्यांना कुरआन समजण्याची सुबुद्धी झाली असती.

५) याच्याने अभिप्रेत कांहीजवळ ऐहिक अप्रतिष्ठा आणि फजिती, आणि मग परलोकाची शिक्षा आहे. आणि कांहीच्याजवळ या जगांतच दुप्पट शिक्षा आहे.

| | |
|---|---|
| आणि आणखी काही लोक आहेत, जे आपल्या अपराधांना कबूल करतात[१]. ज्यांनी सरमिसळ कर्मे केली होती; काही चांगली आणि काही वाईट[२]. अल्लाहकडे आशा आहे की, त्यांचा पश्चात्ताप तो मान्य करील[३], नि:संशय अल्लाहतआला मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१०२) | وَاٰخَرُوۡنَ اعۡتَرَفُوۡا بِذُنُوۡبِهِمۡ خَلَطُوۡا عَمَلًا صَالِحًا وَّاٰخَرَ سَيِّئًا ؕ عَسَى اللّٰهُ اَنۡ يَّتُوۡبَ عَلَيۡهِمۡ ؕ اِنَّ اللّٰهَ غَفُوۡرٌ رَّحِيۡمٌ ﴿۱۰۲﴾ |
| आपण त्यांच्या संपत्तीतून जकात घेऊन घ्या; ज्यामुळे तुम्ही त्यांना पाक साफ करून द्याल. आणि त्यांच्यासाठी दुआ करा[४]; नि:संशय आपली दुआ, यांच्याकरीता समाधानाला कारणीभूत आहे; आणि अल्लाहतआला खूप ऐकतो आणि खूप जाणतो (१०३) | خُذۡ مِنۡ اَمۡوَالِهِمۡ صَدَقَةً تُطَهِّرُهُمۡ وَتُزَكِّيۡهِمۡ بِهَا وَصَلِّ عَلَيۡهِمۡ ؕ اِنَّ صَلٰوتَكَ سَكَنٌ لَّهُمۡ ؕ وَاللّٰهُ سَمِيۡعٌ عَلِيۡمٌ ﴿۱۰۳﴾ |
| काय यांना हे ठाऊक नाही की, अल्लाहच आपल्या भक्तांचा पश्चात्ताप मान्य करतो; आणि तोच दानधर्माला (जकातीला) कबूल करतो[५]; आणि हे की, अल्लाहच तौबा कबूल करण्यात आणि दया करण्यांत परिपूर्ण आहे. (१०४) | اَلَمۡ يَعۡلَمُوۡۤا اَنَّ اللّٰهَ هُوَ يَقۡبَلُ التَّوۡبَةَ عَنۡ عِبَادِهٖ وَيَاۡخُذُ الصَّدَقٰتِ وَاَنَّ اللّٰهَ هُوَ التَّوَّابُ الرَّحِيۡمُ ﴿۱۰۴﴾ |
| सांगून टाका की, तुम्ही कर्म करीत रहा. तुमची कर्मे अल्लाह स्वत: पाहून घेईन. आणि त्याचा पैगंबर आणि ईमानवाले (पण पाहून घेतील) आणि तुम्हास अवश्य अशाजवळ जाणे आहे, जो सर्व गुप्त आणि उघड गोष्टींचा जाणणारा आहे. तर तो तुम्हास तुमचे सर्व केलेले दाखवून देईन[६] (१०५) | وَقُلِ اعۡمَلُوۡا فَسَيَرَى اللّٰهُ عَمَلَكُمۡ وَرَسُوۡلُهٗ وَالۡمُؤۡمِنُوۡنَ ؕ وَسَتُرَدُّوۡنَ اِلٰى عٰلِمِ الۡغَيۡبِ وَالشَّهَادَةِ فَيُنَبِّئُكُمۡ بِمَا كُنۡتُمۡ تَعۡمَلُوۡنَ ۚ﴿۱۰۵﴾ |

१) हे ते प्रांजळ मुसलमान आहेत,जे सबबीशिवाय, निव्वळ आळसामुळे, तबूकमध्ये नबी ﷺ च्या बरोबर गेले नाहीत. किंबहुना नंतर त्यांना आपल्या चुकीची जाणीव होऊन गेली. आणि गुन्ह्याची कबुली देऊन टाकली.

२) भल्याने अभिप्रेत ती पुण्यकर्मे आहेत, जी जिहादमध्ये भाग घेण्यापूर्वी ते करीत राहिले आहेत. ज्यात काही युद्धात भाग घेणेपण आहे. आणि ''काही वाईट'' ने अभिप्रेत हेच तबूकच्या प्रसंगी त्यांचे मागे राहून जाणे आहे.

३) अल्लाहतआलाकडून आशा, भरोशाला जाहीर करण्याचा फायदा देते. म्हणजे अल्लाहतआलाने त्यांच्याकडे लक्ष देऊन त्यांच्या गुन्ह्याच्या कबुलीला, तौबाच्या जागी कायम ठरवून त्यांना क्षमा करून टाकली.

४) हा हुकूम सर्वसाधारण आहे. सदक्याने अभिप्रेत फर्ज सदका म्हणजे जकातपण होऊ शकते आणि नफील सदकापण. नबी ﷺ ला सांगण्यात येत आहे की, त्याच्या मार्फत आपण मुसलमानांना पाक साफ करावे आणि त्यांची शुद्धी करावी. ज्याने ही गोष्ट स्पष्ट होऊन जाते की, जकात आणि दानधर्म मनुष्याचे चारित्र्य आणि कर्तृत्वाची स्वच्छता आणि पावित्र्याचे एक मोठे साधन आहे. याशिवाय सदक्याला सदका यासाठी म्हटले जाते की, हा या गोष्टीला पुरावा देतो की, खर्च करणारा, आपल्या ईमानच्या दाव्यांत खरा आहे. दुसरी गोष्ट ही ठाऊक झाली की, जकात वसूल करणाऱ्याला जकात देणाऱ्याच्या हक्कात भलाईची दुआ करायला पाहिजे. ज्याप्रमाणे येथे अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराला दुआ करण्याचा हुकूम दिला; आणि आपण ﷺ याच्याप्रमाणे दुआ करीत असत. या हुकूमाच्या सर्व साधारण होण्याने हा आधार पण केला गेला की, जकातीची वसुली त्यावेळच्या सत्ताधाऱ्यांची जबाबदारी आहे. जर कोणी याला नाकारेल तर ह.अबुबकर सिद्दीक (रजी.) आणि सहाबा करामच्या कार्यपद्धतीच्या प्रकाशांत याच्या विरुद्ध जिहाद आवश्यक आहे. (इब्ने कसीर)

५) सदकात कबूल करतो चा अर्थ, (या अटीवर की तो हलाल कमाईपासून असावा.) याच्यात वाढ करतो. ज्याप्रमाणे हदीसमध्ये आले आहे, नबी ﷺ नी फर्माविले, ''अल्लाह तुमच्या दानधर्माची अशाप्रकारे जोपासना करीतो, ज्याप्रमाणे तुमच्यातून कोणी मनुष्य आपल्या घोड्याच्या पिलाची जोपासना करतो. येथपावेतो की, एका खजुरीबरोबर दानधर्म, (वाढून वाढून) उहदच्या डोंगराएवढा होऊन जातो.'' (स.बुखारी, स; मुस्लिम किताबुज् जकात)

६) 'रुईयत' (पहाणे) ने अभिप्रेत ज्ञान आहे. म्हणजे तुमच्या कर्मांना अल्लाहतआलाच पहात नाही, किंबहुना याचे ज्ञान, अल्लाहचे पैगंबर आणि ईमानवाल्यांना सुद्धा, ('वह्य' च्या मार्फत) होऊन जाते. (हे दांभिकांच्या बाबतीत सांगण्यात येत आहे) या भावार्थाचे महावाक्य पहिलेपण येऊन चुकले आहे. येथे ईमानवाल्यांची सुद्धा चर्ची आहे. ज्यांना अल्लाहच्या पैगंबराने दाखविल्याने ठाऊक होऊन जाते.

وَاٰخَرُوْنَ مُرْجَوْنَ لِاَمْرِ اللّٰهِ اِمَّا یُعَذِّبُهُمْ وَاِمَّا یَتُوْبُ عَلَیْهِمْ ؕ وَاللّٰهُ عَلِیْمٌ حَكِیْمٌ ﴿١٠٦﴾

आणि काही आणखी लोक आहेत, ज्यांचा मामला अल्लाहचा हुकूम येईपर्यंत पुढे ढकलण्यांत[१] आला आहे. त्यांना शिक्षा करीन[२], किंवा त्याचा पश्चात्ताप मान्य[३] करीन. आणि अल्लाह खूप जाणणारा आणि बुद्धीमान आहे. (१०६)

وَالَّذِیْنَ اتَّخَذُوْا مَسْجِدًا ضِرَارًا وَّكُفْرًا وَّتَفْرِیْقًا بَیْنَ الْمُؤْمِنِیْنَ وَاِرْصَادًا لِّمَنْ حَارَبَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ مِنْ قَبْلُ ؕ وَلَیَحْلِفُنَّ اِنْ اَرَدْنَاۤ اِلَّا الْحُسْنٰی ؕ وَاللّٰهُ یَشْهَدُ اِنَّهُمْ لَكٰذِبُوْنَ ﴿١٠٧﴾

आणि काही असे आहेत, ज्यांनी या उद्देशाने मशीद बनविली आहे की, त्रास द्यावा आणि कुफ्रच्या गोष्टी कराव्यात, आणि ईमानवाल्यांमध्ये फुट पाडावी; आणि त्या माणसाच्या राहाण्याची सोय करावी, जो याचे पूर्वीपासून अल्लाह आणि पैगंबराचा विरोधक[४] आहे. आणि शपथा वाहतील की, भलाईशिवाय, आमचा आणखी काही इरादा नाही.आणि अल्लाह साक्ष आहे की ते फारच लबाड आहेत[५]. (१०७)

لَا تَقُمْ فِیْهِ اَبَدًا ؕ لَمَسْجِدٌ اُسِّسَ عَلَی التَّقْوٰی مِنْ اَوَّلِ یَوْمٍ اَحَقُّ اَنْ تَقُوْمَ فِیْهِ ؕ فِیْهِ رِجَالٌ یُّحِبُّوْنَ اَنْ یَّتَطَهَّرُوْا ؕ وَاللّٰهُ یُحِبُّ الْمُطَّهِّرِیْنَ ﴿١٠٨﴾

आपण तिच्यांत कधी, उभे राहू नये[६], किंबहुना ज्या मशिदीचा पाया पहिल्या दिवसापासून अल्लाहच्या भयावर ठेवला गेला आहे; ती या योग्यतेची आहे की, आपण (सल्ल.) नी तिच्यात उभे रहावे[७]. तिच्यात अशी माणसे आहेत, की फार पाक साफ होण्याला पसंत करतात[८]. आणि अल्लाहतआला फार पाक (साफ) होणाऱ्यांना पसंत करतो. (१०८)

اَفَمَنْ اَسَّسَ بُنْیَانَهٗ عَلٰی تَقْوٰی مِنَ اللّٰهِ وَرِضْوَانٍ خَیْرٌ اَمْ مَّنْ اَسَّسَ بُنْیَانَهٗ عَلٰی شَفَا جُرُفٍ هَارٍ فَانْهَارَ بِهٖ فِیْ نَارِ جَهَنَّمَ ؕ وَاللّٰهُ لَا یَهْدِی الْقَوْمَ الظّٰلِمِیْنَ ﴿١٠٩﴾

तर काय असा मनुष्य चांगला आहे की, ज्याने आपल्या इमारतीचा पाया, अल्लाहला भिण्यावर आणि अल्लाहच्या प्रसन्नतेवर ठेवला असेल; किंवा तो मनुष्य की ज्याने, आपल्या इमारतीचा पाया, अशा घाटाच्या किनाऱ्याजवळ, जो की लवकरच कोसळणार आहे, ठेवला असेल; मग तो याला घेऊन नरकाग्नीत जाऊन पडावा[९]? आणि अल्लाहतआला अशा जालीमांना सुबुद्धी देत नसतो. (१०९)

لَا یَزَالُ بُنْیَانُهُمُ الَّذِیْ بَنَوْا رِیْبَةً فِیْ قُلُوْبِهِمْ اِلَّاۤ اَنْ تَقَطَّعَ قُلُوْبُهُمْ ؕ وَاللّٰهُ عَلِیْمٌ حَكِیْمٌ ﴿١١٠﴾

यांची ही इमारत जी त्यांनी बनविली आहे, नेहमी त्यांच्या मनांत खटकत राहील, होय! परंतु जर यांची मनेच नष्ट होऊन जातील[१०], (तर वेगळी गोष्ट आहे.) आणि अल्लाहतआला मोठा ज्ञानी आणि बुद्धीवान आहे. (११०)

اِنَّ اللّٰهَ اشْتَرٰی مِنَ الْمُؤْمِنِیْنَ اَنْفُسَهُمْ وَاَمْوَالَهُمْ بِاَنَّ لَهُمُ الْجَنَّةَ ؕ یُقَاتِلُوْنَ فِیْ سَبِیْلِ اللّٰهِ فَیَقْتُلُوْنَ وَیُقْتَلُوْنَ ۫ وَعْدًا عَلَیْهِ حَقًّا فِی التَّوْرٰىةِ وَالْاِنْجِیْلِ وَالْقُرْاٰنِ ؕ وَمَنْ اَوْفٰی بِعَهْدِهٖ مِنَ اللّٰهِ فَاسْتَبْشِرُوْا بِبَیْعِكُمُ الَّذِیْ بَایَعْتُمْ بِهٖ ؕ وَذٰلِكَ هُوَ الْفَوْزُ الْعَظِیْمُ ﴿١١١﴾

नि:संशय अल्लाहतआलाने, मुसलमानांकडून त्यांचे प्राण आणि त्यांची संपत्ती या गोष्टीच्या ऐवजी खरेदी करून घेतली आहे की, त्यांना स्वर्ग मिळेल[११], ते लोक अल्लाहच्या मार्गात लढतात; ज्यात ठार मारतात आणि ठार मारले जातात; यावर खरा वायदा केला गेला आहे, तौरातमध्ये, आणि इंजीलमध्ये आणि कुरआनात;आणि अल्लाहपेक्षा जास्त आपल्या कराराला पूर्ण करणारा कोण आहे[१२] ? तर तुम्ही लोक आपल्या त्या सौद्यावर जो तुम्ही केला आहे, खुशी माना[१३]. आणि हे मोठेच साफल्य आहे. (१११)

१) तबूकच्या लढाईत मागे राहणारे एक तर मुनाफिक होते; दुसरे ते जे काहीही कारणाविना मागे राहून गेले होते. आणि ज्यांनी आपल्या चुकीला मान्य करून टाकले होते. परंतु त्यांना क्षमा केली गेली नव्हती. या महावाक्यात याच समूहाचा उल्लेख आहे. ज्यांचे मामले पुढे ढकलून देण्यात आले होते. (या तीन व्यक्ती होत्या, ज्यांचा उल्लेख पुढे येत आहे.)

२) जर ते आपल्या चुकीवर अडून राहिलेत.

३) जर ते खरा पश्चात्ताप व्यक्त करतील.

४) यांत दांभिकांच्या एका अत्यंत निंदनीय कृत्याचे वर्णन आहे की, त्यांनी एक मशीद बनविली. आणि नबी ﷺ ला असे भासविले की, पाऊस,थंडी अशा प्रकारच्या प्रसंगी आजारीआणि दुर्बलांना, जास्त दूर जाण्यात अडचण येते. त्यांच्या सवलतीसाठी आम्ही ही मशीद बनविली आहे. आपण तेथे येऊन नमाज पढवावी; की आम्हास बरकत प्राप्त व्हावी. आपण ﷺ त्यावेळी तबूकला जाण्यासाठी घोड्यावर स्वार झाले होते. आपण ﷺ नी परत आल्यावर नमाज

पढविण्याचा वायदा केला परंतु परतल्यावर वहृयच्या मार्फत, अल्लाहतआलाने ढांभिकांच्या मूळ उद्देशाला जाहीर करुन टाकले की याच्याने ते मुसलमानांना नुकसान पोहचवणे, कुफ्रला फैलावणे, मुसलमानांच्या दरम्यान फुट टाकणे, आणि अल्लाह आणि रसूलच्या शत्रुंसाठी वस्तीस्थान पुरवू इच्छित होते.
५) म्हणजे खोट्या शपथा वाहून, ते नबी ﷺ ला धोका देऊं इच्छित होते. परंतु अल्लाहतआलाने, आपणांस त्यांच्या चाली आणि धोका देण्यापासून वाचवून घेतले; आणि सांगितले की त्यांचा इरादा बरोबर नाही. आणि हे जे काही प्रकट करीत आहे, त्यांत ते लबाड आहेत.
६) म्हणजे आपण तेथे जाऊन जो नमाज पढण्याचा वायदा केला आहे; त्याच्या प्रमाणे तेथे जाऊन नमाज पढू नका म्हणून आपण ﷺ नी फक्त एवढेच नाही की, तेथे नमाज पढली नाही; किंबहुना आपल्या काही साथीदारांना पाठवून, ती मशीद पाडून टाकली आणि तिला नष्ट करून टाकले. याच्याने धर्मपंडीतांनी आधार घेतला आहे की, जी मशीद अल्लाहच्या उपासनेऐवजी मुसलमानांत फुट टाकण्याच्या गरजेनुसार बनविली जाईल, ती मस्जिदे जिरार (ढांभिकांनी बांधलेली मशीद) आहे. तिला पाडून टाकण्यांत यावी की, तिच्यामुळे मुसलमानांत फुट आणि गोंधळ निर्माण होऊं नये. परंतु या उम्मते मुसलिमांमध्ये, असे जालीम पण निर्माण झाले, त्यांनी मतभेदाच्या आधारावर नव्या नव्या मशीदीच बनवल्या नाहीत, परंतु स्वत: खान-ए-काबामध्ये, चार मुसल्ले कायम करून, मुसलमानांना चार तुकड्यांत वाटून ठेवले, ''फनल्लाहु व फइन्नालिल्लाहे इन्ना इलैहि राजीऊन.'' अल्लाहतआला क्षमा करो! सुलतान अ.अजीज (رَحِمَهُ اللهُ) नज्द व हिजाजचे सत्ताधिश ज्यांनी खाना-ए-काबावून या बिदअतीच्या आणि फुटीला नाहीसे केले आणि मुसलमानांना एका कलम्यावर जमा केले. 'रहेमुहुल्लाहु रहमतन वासेआ'
७) याने अभिप्रेत कोणती मशीद आहे ? यांत मतभेद आहे. काहींनी इला मस्जिदे कुबा आणि काहींनी मस्जिदे नबवी ﷺ ठरविले आहे. सलफचा एक एक समूह दोघांना मानणारा राहिला आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात, की या महावाक्याने जर मसजिदे कुबा अभिप्रेत आहे तर काही हदीसीमध्ये मसजिदे नबवीला 'उस्सिसा अल्‌ततकवा' ठरविण्यात आले आहे. म्हणून जरी मस्जिदे कुबा मध्ये जरी हे वैशिष्टय आढळून येते की, पहिल्या दिवसापासूनच हिची आधारशिला ईशभयावर ठेवण्यांत आली आहे. तर मस्जिदे नबवी तर, चांगल्या प्रकारे या वैशिष्ट्याला धारण करणारी आहे. आणि याला योग्य आहे.
८) हदीसमध्ये येते की, याच्याने अभिप्रेत कुबावाले आहेत. नबी ﷺ नी यांना विचारले की अल्लाहतआलाने तुमच्या पाकसाफ राहण्याची प्रशंसा केली आहे. तुम्ही काय करता? त्यांनी सांगितले की आम्ही ढेले वापरण्या बरोबरच पाण्याचा पण उपयोग करतो. (इब्ने कसीरच्या हवाल्याने) इमाम इब्ने कसीर म्हणतात, की हे महावाक्य या गोष्टीचा पुरावा आहे की, अशा जुन्या मशीदीमध्ये नमाज पढणे पसंत केले गेले आहे; जी अल्लाह् वहदहु ला शरीक च्या उपासनेच्या उद्देशाने बांधण्यात आली असावी. तसेच सदाचरणी लोकांचा समूह आणि अशा लोकांच्या बरोबर नमाज पढणे चांगले आहे; जे संपूर्ण वजू करणे आणि पाकसाफ राहाण्याचा योग्य बंदोबस्त करणारे आहेत.
९) यात ईमानवाला आणि ढांभिक, यांच्या कर्माची उदाहरणे वर्णन करण्यांत आली आहेत. ईमानवाल्यांचे कर्म अल्लाहच्या भयावर आणि प्रसन्नतेसाठी असते. जेव्हा की ढांभिकांचे कर्म लोकांना दाखविण्यासाठी आणि फिसादावर आधारित असते. जे त्या जमिनीच्या भागासारखे आहे, ज्याच्याखालून घाटाचे पाणी वाहाते; आणि मातीला बरोबर वाहून नेते. तो भाग खालून पोकळ होऊन जातो. ज्यावर काही बांधकाम केले जाईल, तर ते लगेच पडून जाईल. या ढांभिकांचे मशीद बनविण्याचे कृत्य असेच आहे, जे त्यांना नरकाग्नीमध्ये बरोबर घेऊन पडेल.
१०) मन नष्ट होऊन जाण्याचा अर्थ मृत्यु पावणे असा आहे. म्हणजे मृत्युपर्यंत ही इमारत त्यांच्या मनांत आणखी, शंका आणि ढांभिकता, निर्माण करण्याचे साधन बनून राहील. ज्याप्रमाणे वासराच्या पुजाऱ्यामध्ये वासराचे प्रेम घर करून राहिले होते.
११) हे अल्लाहतआलाच्या खास कृपेचे वर्णन आहे, की त्याने ईमानवाल्यांना त्यांच्या तन मन धनाच्या बदल्यांत जे त्यांनी अल्लाह्च्या मार्गांत खर्च केलेत, स्वर्ग बहाल केला; जेव्हा की हे तन मन धनसुद्धा त्याचेच दिलेले आहे. मग किंमत आणि मोबदला जो दिला म्हणजे स्वर्ग; तो फारच बहुमूल्य आहे.
१२) ही त्याच सौद्याची ताकीद आहे की हा खरा वायदा, मागील पुस्तकामध्ये सुद्धा आणि कुरआनांत सुद्धा केला गेला आहे. आणि अल्लाहपेक्षा जास्त वचन पूर्ण करणारा आणखी कोण असू शकतो?
१३) हे मुसलमानांना सांगण्यात येत आहे; परंतु आनंद तेव्हाच उपभोगला जाऊ शकतो, जेव्हा मुसलमानांना सुद्धा हा सौदा मंजुर असेल. म्हणजे अल्लाहच्या मार्गात तन मन धनाचा त्यागापासून त्यांना इन्कार नसेल.

التَّآئِبُوْنَ الْعٰبِدُوْنَ الْحٰمِدُوْنَ السَّآئِحُوْنَ
الرّٰكِعُوْنَ السّٰجِدُوْنَ الْاٰمِرُوْنَ بِالْمَعْرُوْفِ
وَالنَّاهُوْنَ عَنِ الْمُنْكَرِ وَالْحٰفِظُوْنَ لِحُدُوْدِ اللّٰهِ ۗ
وَبَشِّرِ الْمُؤْمِنِيْنَ ﴿١١٢﴾

**ते असे आहेत, जे तौबा करणारे, उपासना करणारे, स्तुती करणारे, उपवास ठेवणारे, (दूसरा अर्थ अल्लाहच्या मार्गात प्रवास करणारे) 'रुकुअ' आणि सज्दा करणारे, चांगल्या गोष्टींची शिकवण देणारे,वाईट कामांपासून मना करणारे, आणि अल्लाहच्या घालून दिलेल्या मर्यादांचे संरक्षण करणारे आहेत[१]; आणि अशा ईमानवाल्यांना आपण शुभवर्तमान ऐकवून द्या[२]. (११२)**

مَا كَانَ لِلنَّبِيِّ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَنْ يَّسْتَغْفِرُوْا
لِلْمُشْرِكِيْنَ وَلَوْ كَانُوْٓا اُولِيْ قُرْبٰى مِنْۢ بَعْدِ مَا تَبَيَّنَ
لَهُمْ اَنَّهُمْ اَصْحٰبُ الْجَحِيْمِ ﴿١١٣﴾

**पैगंबराला आणि दुसऱ्या मुसलमानांना हे योग्य नाही की, मुशरिकीनसाठी, क्षमेची प्रार्थना करावी; जरी ते (त्यांचे) नातेवाईक का असेना! या हुकुमाच्या प्रकट झाल्यानंतर की, हे लोक नर्कवासी आहेत[३]. (११३)**

وَمَا كَانَ اسْتِغْفَارُ اِبْرٰهِيْمَ لِاَبِيْهِ اِلَّا عَنْ مَّوْعِدَةٍ
وَّعَدَهَآ اِيَّاهُ ۚ فَلَمَّا تَبَيَّنَ لَهٗٓ اَنَّهٗ عَدُوٌّ لِّلّٰهِ
تَبَرَّاَ مِنْهُ ۗ اِنَّ اِبْرٰهِيْمَ لَاَوَّاهٌ حَلِيْمٌ ﴿١١٤﴾

**आणि इब्राहीमचे आपल्या बापासाठी क्षमेची प्रार्थना करणे, ते फक्त केलेल्या वायद्याप्रमाणे होते. जो त्यांनी त्याच्याशी वायदा करून घेतला होता. मग जेव्हा त्यांच्यावर ही गोष्ट स्पष्ट होऊन गेली की, तो अल्लाहचा दुष्मन आहे, तेव्हा ते त्याच्यापासून अगदीच अलिप्त होऊन गेले[४]; नि:संशय इब्राहीम कोमल अंत:करणाचे दर्याद्र असे होते[५]. (११४)**

وَمَا كَانَ اللّٰهُ لِيُضِلَّ قَوْمًا ۢ بَعْدَ اِذْ هَدٰىهُمْ حَتّٰى
يُبَيِّنَ لَهُمْ مَّا يَتَّقُوْنَ ۗ اِنَّ اللّٰهَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿١١٥﴾

**आणि अल्लाह असे करीत नाही की, कोण्या एका समूहाला सरळमार्गी लावून दिल्यानंतर मागून मार्गभ्रष्ट करून टाकेल; जो पावेतो की, त्या गोष्टींना स्पष्ट करून दाखवून देणार नाही, ज्यांच्यापासून त्यांनी वाचावे[६]; नि:संशय अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीला फार चांगल्या प्रकारे जाणतो (११५)**

اِنَّ اللّٰهَ لَهٗ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۗ يُحْيٖ وَيُمِيْتُ ۗ
وَمَا لَكُمْ مِّنْ دُوْنِ اللّٰهِ مِنْ وَّلِيٍّ وَّلَا نَصِيْرٍ ﴿١١٦﴾

**नि:संशय अल्लाहचेच राज्य आहे, आकाशांवर आणि पृथ्वीत. तोच जिववितो आणि (तोच) मारतो; आणि तुमचा अल्लाहशिवाय न कोणी मित्र आहे, न कोणी मददगार आहे. (११६)**

لَقَدْ تَّابَ اللّٰهُ عَلَى النَّبِيِّ وَالْمُهٰجِرِيْنَ وَالْاَنْصَارِ
الَّذِيْنَ اتَّبَعُوْهُ فِيْ سَاعَةِ الْعُسْرَةِ مِنْۢ بَعْدِ مَا كَادَ
يَزِيْغُ قُلُوْبُ فَرِيْقٍ مِّنْهُمْ ثُمَّ تَابَ عَلَيْهِمْ ۗ اِنَّهٗ
بِهِمْ رَءُوْفٌ رَّحِيْمٌ ﴿١١٧﴾

**अल्लाहतआलाने पैगंबराच्या ﷺ स्थितीवर मोठीच कृपा केली, तसेच मुहाजिरीन आणि अन्सारच्या स्थितीवरसुद्धा, की ज्यांनी अशा अडचणीच्या समयी, पैगंबरा ﷺ चा साथ दिला[७]. यानंतर की, त्यांच्यातून एका गटाची मने डळमळीत व्हावयास लागली होती[८]. मग अल्लाहतआलाने त्यांच्या स्थितीवर कृपा केली. नि:संशय अल्लाहतआला त्या सर्वांवर अतिशय कनवाळू (व) दयाळू आहे. (११७)**

१) हे त्याच ईमानवाल्यांचे वैशिष्टय वर्णन केले जात आहे. ज्यांच्या तन मन धनाचा सौदा अल्लाहतआलाने करून घेतला आहे. ते पापापासून आणि निर्लज्जपणाच्या कामांपासून, तौबा करणारे, आपल्या पालनकर्त्याची उपासना करणारे, तोंडाने अल्लाहतआलाची स्तुती आणि प्रसंशा करणारे, आणि दुसरी वैशिष्टये धारण करणारी आहेत, जी महावाक्यांत चर्चित आहे. 'सियाहत' ने अभिप्रेत बहुतेक भाष्यकारांनी उपवास धरले आहेत. आणि यालाच इब्ने कसीरने, अगदी बरोबर आणि खूप प्रसिद्ध 'म्हणणे' ठरविले आहे. आणि काहींनी याच्याने 'जिहाद' अभिप्रेत केले आहे. तथापि 'सियाहत' ने जमिनीचा प्रवास अभिप्रेत नाही; ज्याप्रमाणे काही लोकांनी समजले आहे. याचप्रमाणे अल्लाहच्या उपासनेसाठी पर्वतांच्या शिखरांवर गुहा आणि निर्मनुष्य जंगलामध्ये, जाऊन डेरे दाखल होणे, पण याच्याने अभिप्रेत नाही. कारण की हे जगाचा त्याग आणि संन्यासवृत्तीचा एक भाग आहे, जो इस्लाम धर्मांत नाही. तथापि फितन्याच्या काळात, आपल्या धर्माला वाचविण्याकरीता शहरे आणि वस्त्यांना सोडून, जंगलात आणि अरण्यांत जाऊन राहाण्याची परवानगी हदीसमध्ये देण्यांत आली आहे. (स.बुखारी)

२) अर्थ हा आहे की पूर्ण ईमानवाला तो आहे, जो उक्तीत आणि कृतीत इस्लामच्या शिकवणुकीचा उत्कृष्ट नमूना

असावा आणि त्या गोष्टीपासून वाचणारा असावा, ज्यापासून अल्लाहने त्याला मना केले आहे आणि अशा प्रकारे अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांना पायदळी तुडविणे नाही, किंबहुना त्यांचे संरक्षण करणारा असावा. असेच संपूर्ण ईमानवाले शुभवर्तमानाला पात्र आहेत. ही तीच गोष्ट आहे ज्याला कुरआनांत ''ईमान आणले; आणि चांगली कामे केलीत'' ने वारंवार वर्णन केले गेले आहे. येथे चांगल्या कामांची तपशील देण्यात आली आहे.

३) याचे भाष्य सहीह बुखारी मध्ये, याप्रमाणे आहे की, जेव्हा नबी ﷺ चे वयोवृद्ध चुलते अबुतालिबचा शेवटचा वेळ आला तेव्हां नबी ﷺ त्यांच्याजवळ गेले; त्यावेळी त्यांच्याजवळ अबुजहल् आणि अब्दुल्लाह बिन अबी उमैय्या पण बसलेले होते. आपण ﷺ नी म्हटले, ''काकाजी ' लाइलाहा इल्लल्लाह् म्हणून घ्या, की ज्यामुळे मी अल्लाहजवळ, आपल्यासाठी हुज्जत करूंशकेन.'' अबुजहल आणि अब्दुल्लाह् बिन अबी उमैय्याने म्हटले, हे अबुतालिब! काय अबुदुल् मुत्तलिबच्या धर्मापासून फिरून जाणार? (म्हणजे  मरतेवेळी हे काय करीत आहात? येथपर्यंत की याच स्थितीत त्यांचा मृत्यु झाला) नबी ﷺ नी म्हटले, ''जोपर्यंत अल्लाहतआलाकडून मला मना करण्यात येणार नाही, मी आपल्यासाठी क्षमायाचना करीत राहील.'' ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले ज्यांत मुशरिकीनसाठी, क्षमेची प्रार्थना करण्यांस मज्जाव करण्यांत आला आहे. (स.बुखारी, किताबुल तफसीर सू.तौबा) आणि सू.कससची आयत ५६, ''इन्नका ला तहदी, मन अहेबब्ता'' सुद्धा याच अनुषंगाने अवतीर्ण झाली आहे. मुसनद अहमदच्या एका रिवायतीमध्ये आहे की, नबी ﷺ नी, आपल्या आईसाठी क्षमायाचनेची प्रार्थना करण्याची परवानगी मागितली. ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले. (मुसनद अहमद जि.५ पृष्ठ ३५५) आणि नबी ﷺ नी, आपल्या मुशरिक लोकांसाठी जी प्रार्थना केली होती, ''या अल्लाह्! माझे लोक अज्ञानी आहेत. त्यांना क्षमा करून टाक !'' या महावाक्यांच्या विरूद्ध नाही. यासाठी की, याचा अर्थ, त्यांच्या हिदायतसाठी दुआ आहे. म्हणजे ते माझ्या स्थान आणि योग्यतेला जाणत नाहीत. त्यांना हिदायत दे की, त्यांनी तुझ्या माफीला पात्र होऊन जावे. आणि जिवंत काफिर आणि मुश्रिकांसाठी हिदायतची दुआ करणे योग्य आहे.

४) म्हणजे जेव्हा ह. इब्राहीम عليه السلام वर सुद्धा जेव्हा ही गोष्ट जाहीर होऊन गेली की, माझा बाप अल्लाहचा दुष्मन आणि नरकवासी आहे, तेव्हा ते त्याच्यापासून अगदी अलिप्त होऊन गेले. आणि त्यानंतर क्षमायाचनेची प्रार्थना केली नाही.

५) आणि सुरवातीला, बापासाठी क्षमायाचना सुद्धा, कनवाळू अंत:करण आणि दर्याद्र वृत्तीमुळे केली होती.

६) जेव्हा अल्लाहतआलाने, मुशरिकांच्या बाबतीत, क्षमायाचनेची प्रार्थना करण्यापासून मना केले, तर काही सहाबांना, ज्यांनी असे केले होते, त्यांना असे वाटू लागले की, असे करून त्यांनी मार्गभ्रष्टतेचे काम तर केले नाही ? अल्लाहतआलाने फर्माविले, की अल्लाहतआला जोपर्यंत जपण्याच्या कामांचे स्पष्टीकरण करून देत नाही, तोपर्यंत त्याच्यावर पकड पण करीत नाही. तसेच त्याला मार्गभ्रष्टतापण ठरवत नाही. तथापि जेव्हा या कामांपासून जपत नाही, ज्यांच्यापासून मना केले जाऊन चुकले आहे, तर मग अल्लाहतआला त्याला मार्गभ्रष्ट करून टाकतो. म्हणून ज्या लोकांनी, या हुकुमाआधी, आपल्या मरण पावलेल्या, मुशरिक नातलगांसाठी, क्षमायाचनेची प्रार्थना केली आहे; त्यांची पकड केली जाणार नाही, कारण की, त्यांना समस्येचे त्यावेळी ज्ञानच नव्हते.

७) तबूकच्या युद्धाच्या प्रवासाला, ''अडचणीचा काळ'' ठरविले गेले आहे. यासाठी की एकतर कडक उन्हाळ्याचे दिवस होते. दुसरे, पिके (काढणीसाठी) तयार झाली होती. तिसरे, प्रवास फारच लांबचा होता. आणि चौथे, साहित्य सामुग्रीची पण कमतरता होती. म्हणून त्याला ''जैशुल उसरा'' (अडचणीचा काफला किंवा सैन्य) म्हटले जाते. 'तौबा' साठी आवश्यक नाही की पहिले, पाप किंवा चूक केली जावी. याच्या शिवाय सुद्धा दर्जांत बढोत्तरीसाठी, आणि नकळत होऊन जाणाऱ्या कोतायांकरीता तौबा करणे असते. येथे मुहाजिरीन आणि अन्सारच्या त्या पहिल्या गटाची तौबा, याच अनुषंगाने आहे, ज्यांनी क्षणाचाही विलंब न करता, नबी ﷺ च्या, जिहादच्या आव्हानावर 'लब्बैक' (मी हजर आहे) म्हटले.

८) हे त्या दुसऱ्या गटाचे वर्णन आहे, ज्याला चर्चित कारणांमुळे, सुरवातीला शंका कुशंका झाली. परंतु लवकरच तो या स्थितीतून बाहेर पडला; आणि आनंदाने जिहादमध्ये शामील झाला. मनात डावांडोल ने अभिप्रेत, धर्मांत काही शंका कुशंका नाही, किंबहुना चर्चित ऐहिक सबबीमुळे, जिहादमध्ये शामील होण्यास, मागे पुढे होणे किंवा डांवाडोल, अभिप्रेत आहे.

وَّ عَلَى الثَّلٰثَةِ الَّذِيْنَ خُلِّفُوْا ؕ حَتّٰۤى اِذَا ضَاقَتْ عَلَيْهِمُ الْاَرْضُ بِمَا رَحُبَتْ وَضَاقَتْ عَلَيْهِمْ اَنْفُسُهُمْ وَظَنُّوْۤا اَنْ لَّا مَلْجَاَ مِنَ اللّٰهِ اِلَّاۤ اِلَيْهِ ؕ ثُمَّ تَابَ عَلَيْهِمْ لِيَتُوْبُوْا ؕ اِنَّ اللّٰهَ هُوَ التَّوَّابُ الرَّحِيْمُ ﴿۱۱۸﴾

**आणि तीन माणसांच्या स्थितीवर सुद्धा, ज्यांचा मामला विलंबीत टाकण्यांत आला होता[१]; येथपर्यंत की जमीन विस्तीर्ण असून सुद्धा त्यांना तंग वाटू लागली, आणि ते आपल्या जीवनाशीही तंग होऊन गेलेत[२]; आणि ते समजून गेले की, अल्लाहशिवाय आणखी कोठेच आश्रय मिळू शकत नाही; याशिवाय की, त्याच्याकडे पश्चात्ताप व्यक्त केला जावा. मग (अल्लाहने) त्यांच्या स्थितीवर कृपा केली की, त्यांनी पुढेही पश्चात्ताप व्यक्त करीत रहावा[३]; नि:संशय अल्लाहतआला, फारच पश्चात्ताप मान्य करणारा आणि दयाळू आहे. ११८**

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّقُوا اللّٰهَ وَكُوْنُوْا مَعَ الصّٰدِقِيْنَ ﴿۱۱۹﴾

**हे ईमानवाल्यांनो! अल्लाहला भ्या, आणि सत्यवादींच्या बरोबर रहा[४]. ११९**

مَا كَانَ لِاَهْلِ الْمَدِيْنَةِ وَمَنْ حَوْلَهُمْ مِّنَ الْاَعْرَابِ اَنْ يَّتَخَلَّفُوْا عَنْ رَّسُوْلِ اللّٰهِ وَلَا يَرْغَبُوْا بِاَنْفُسِهِمْ عَنْ نَّفْسِهٖ ؕ ذٰلِكَ بِاَنَّهُمْ لَا يُصِيْبُهُمْ ظَمَاٌ وَّلَا نَصَبٌ وَّلَا مَخْمَصَةٌ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ وَلَا يَطَـُٔوْنَ مَوْطِئًا يَّغِيْظُ الْكُفَّارَ وَلَا يَنَالُوْنَ مِنْ عَدُوٍّ نَّيْلًا اِلَّا كُتِبَ لَهُمْ بِهٖ عَمَلٌ صَالِحٌ ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يُضِيْعُ اَجْرَ الْمُحْسِنِيْنَ ﴿۱۲۰﴾

**मदीनेच्या राहणाऱ्यांना, आणि जे ग्रामिण लोक त्यांच्या आसपास आहेत,हे त्यांना शोभत नव्हते की, रसूलुल्लाह (सल्ल.) चा साथ देऊ नये[५]. आणि न हे की, आपल्या जिवाला त्यांच्या (सल्ल.) जिवापेक्षा, प्रिय समजावे[६]; हे या कारणाने की[७], त्यांना अल्लाहच्या मार्गात जी तहान लागली, जे कष्ट पोहोचले, आणि जी भूक लागली, आणि जे चालणे त्यांना चालावे लागले, जे काफिरांना क्षुब्ध करत असते[८] आणि शत्रूंची जी काही खबर घेतली[९]; या सर्वांवर, त्यांच्या नावे, एक एक सत्कृत्य लिहिले गेले. खचित्च अल्लाहतआला प्रांजळपणे काम करणाऱ्यांचा मोबदला वाया जाऊं देत नसतो. १२०**

وَلَا يُنْفِقُوْنَ نَفَقَةً صَغِيْرَةً وَّلَا كَبِيْرَةً وَّلَا يَقْطَعُوْنَ وَادِيًا اِلَّا كُتِبَ لَهُمْ لِيَجْزِيَهُمُ اللّٰهُ اَحْسَنَ مَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿۱۲۱﴾

**आणि जो काही लहान मोठा त्यांनी खर्च केला; आणि जितकी मैदाने त्यांना आक्रमावी लागली[१०], हे सर्व सुद्धा त्याच्या नांवे लिहिले गेले. कारण की, अल्लाहतआलाने त्यांच्या कामांचा, चांगल्यात चांगला मोबदला द्यावा १२१**

وَمَا كَانَ الْمُؤْمِنُوْنَ لِيَنْفِرُوْا كَآفَّةً ؕ فَلَوْلَا نَفَرَ مِنْ كُلِّ فِرْقَةٍ مِّنْهُمْ طَآئِفَةٌ لِّيَتَفَقَّهُوْا فِى الدِّيْنِ وَلِيُنْذِرُوْا قَوْمَهُمْ اِذَا رَجَعُوْۤا اِلَيْهِمْ لَعَلَّهُمْ يَحْذَرُوْنَ ﴿۱۲۲﴾

**आणि मुसलमानांनी असे करावयास नको की, सर्वच्या सर्वांनी निघून पडावे; तर असे का न केले जावे की, त्यांच्या प्रत्येक मोठ्या समूहांतून, एक लहान समूह निघाला असता, कारण की त्यांनी धर्माचे ज्ञान उपलब्ध करून घ्यावे; अशासाठी जेव्हा हे लोक, आपल्या समाजाजवळ येतील, त्यांना भिववावे, की, त्यांनी भिऊन जावे[११] १२२**

१) 'खुल्लिफू' चा तोच अर्थ आहे, जो 'मुर्‌जव्ना' चा आहे. म्हणजे ज्यांचे प्रकरण पुढे ढकलून विलंबीत करण्यात आले होते; आणि पन्नास दिवसांनंतर त्यांची तौबा मान्य झाली, हे तीन सहाबा होते, काब बिन मालिक, मुरारा बिन रबीअ, आणि हिलाल बिन उमैय्या ﵃ ही तिघे फारच प्रांजळ मुसलमान होते. याच्यापूर्वी ते प्रत्येक लढाईत शामील होत राहिले. या तबूकच्या लढाईत, फक्त आळसाने शामील झाले नाहीत. मागून त्यांना आपल्या चुकीची जाणीव झाली; तेव्हा विचार केला की, एक चूक (मागे राहून जाण्याची) तर होऊनच गेली आहे; परंतु आता ढांभिकांप्रमाणे, रसूलुल्लाह ﷺ च्या सेवेत, खोट्या सबबी पुढे करण्याची चूक करणार नाही. म्हणून सेवेत हजर होऊन, आपल्या चुकीला स्पष्ट मान्य करून घेतले; आणि त्याच्या शिक्षेला स्वत:ला सादर करून दिले. नबी ﷺ नी, त्यांच्या प्रकरणाला अल्लाहच्या हवाली करून दिले, की त्याने यांच्या बाबतीत काही हुकूम सादर करावा. तथापि या दरम्यान आपण ﷺ नी सहाबा कराम ﵃ ला, या तीन व्यक्तींशी संबंध कायम करणे, येथपावेतो की, त्यांच्याशी, गप्पा गोष्टी करण्यांस पण मना करून टाकले. आणि चाळीस रात्रीनंतर त्यांना हुकूम देण्यांत आला की, त्यांनी आपल्या पत्नी पासून पण दूर रहावे. म्हणून पत्नीपासून दूर रहाण्यावर अंमलबजावणी होऊन गेली. आणखी दहा दिवस गेलेत, तेव्हा तौबा (पश्चात्ताप) कबूल करून घेण्यात आली. आणि वरील महावाक्य अवतरीत झाले. (या घटनेचा पूर्ण तपशील, ह.काब बिन मालिक ﵁ कडून सांगण्यात आलेल्या हदीसमध्ये आढळून येतो. कृपया पहावे स.बुखारी, स. मुस्लिम)

२) हे त्या दिवसांच्या वस्तुस्थितीचे वर्णन आहे, ज्यातून सामाजिक बहिष्कारामुळे त्यांना पार पडावे लागले.

३) म्हणजे पन्नास दिवसानंतर अल्लाहने त्यांचे रडणे भेकणे आणि तौबा कबूल केली.

४) सत्यामुळेच (खरे बोलण्यामुळेच) अल्लाहतआलाने त्या तीन सहाबांची चूक माफ करून टाकली. तसेच त्यांच्या

तौबाला कुरआन बनवून अवतरीत केले. ''रजी अल्लाह अन्हुम व रजुअनहो.'' म्हणून ईमानवाल्यांना हुकूम देण्यात आला की, अल्लाहला भ्या, आणि सत्यवादी बरोबर रहा. याचा अर्थ हा आहे की, ज्यांच्या मध्ये तकवा (म्हणजे अल्लाहचे भय) असेल, तो खरा पण असेल; आणि जो खोटारडा असेल, तर समजून घ्या की त्याचे मन तकव्यापासून रिक्त आहे. याचसाठी हदीस मध्ये येते की, ईमानवाल्यांकडून आणखी काही कोत्ताया होऊ शकतात; परंतु तो खोटारडा असत नाही.

५) तबूक युद्धांत भाग घेण्यासाठी, कारण की, सर्वसाधारण दवंडी पिटवून देण्यात आली होती, म्हणून, अपंग,वृद्ध दुसरे धर्मशास्त्राप्रमाणे सबबी, बाळगणाऱ्यांशिवाय, सर्वांसाठी याच्यांत भाग घेणे आवश्यक होते. परंतु तरी सुद्धा जे मदीनेचे राहणारे, किंवा मदीनेच्या आसपासचे लोक, यांच्यातून जे जिहादमध्ये सहभागी झाले नाहीत, अल्लाहतआला त्यांची कानउघाडणी करीत म्हणत आहे की, त्यांना रसूलुल्लाह ﷺ च्या मागे राहून जावयास नको होते.

६) म्हणजे हे पण त्यांच्यासाठी शोभनीय नाही, की स्वत: आपल्या प्राणाचे तर संरक्षण करून घ्यावे; आणि रसूलुल्लाह ﷺ च्या प्राणाच्या संरक्षणाचा, त्यांना विचार (देखील) नसावा. किंबहुना त्यांनी रसूलुल्लाह ﷺ च्या बरोबर राहून, आपल्यापेक्षा जास्त, त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था करावयास हवी.

७) 'जालेका' ने मागे न राहून जाण्याचे कारण वर्णन करण्यांत येत आहे. म्हणजे त्यांना यासाठी मागे राहून जावयास पाहिजे नव्हते की, त्यांना अल्लाहच्या मार्गात जी तहान,थकवा,भूक लागेल; किंवा अशी कृत्ये ज्याच्याने काफिरांच्या क्रोधात वाढ होईल, त्याचप्रमाणे शत्रुंच्या माणसांना ठार करतील किंवा कैदी बनवतील; ही सर्वच्या सर्व कामे, सत्कृत्ये म्हणून लिहिली जातील; म्हणजे सत्कृत्ये फक्त हीच नाहीत की, मनुष्य एखाद्या मशिदीत किंवा एकांतात बसून , नफील नमाजी, कुरआनाचे पठण, अल्लाहचे नामस्मरण वगैरे करेल; किंबहुना जिहादमध्ये होणारा प्रत्येक त्रास आणि परेशानी, येथ पावेतो की, त्या कारवाया सुद्धा, ज्यामुळे शत्रुच्या मनांत भीती निर्माण होईल किंवा ते क्रोधीत होतील; याच्यातून प्रत्येक गोष्ट अल्लाहतआला जवळ, सत्कृत्य म्हणून लिहिली जाईल. म्हणून केवळ उपासनेच्या आवडीत सुद्धा, जिहादपासून पळ काढणे, योग्य नाही. हे काय की, माणसाने कुठल्याही कारणाशिवाय, जिहादमध्ये भाग घेण्यास टाळाटाळ करावी?

८) याच्याने अभिप्रेत, पायी किंवा घोडे वगैरेंवर स्वार होऊन, अशा इलाख्यातूंन जाणे आहे की, त्यांच्या पावलांच्या आवाजाने घोड्यांच्या टापांमुळे, शत्रुच्या मनाचा थरकांप होऊन जावा. आणि त्यांचा क्रोधाग्नी भडकून उठावा.

९) ''शत्रू कडून कोणी वस्तू घेतात किंवा त्यांना हिसका दाखवतात.'' ने अभिप्रेत त्यांच्या माणसांना ठार करणे किंवा कैदी बनविणे आहे; किंवा त्यांना पराजीत करून, गनीमतचा माल प्राप्त करतात.

१०) डोंगरांच्या मधली मैदाने, आणि पाणी वाहत असलेल्या जागांना 'वादी' म्हणतात. अभिप्रेत येथे निरनिराळ्या दऱ्या आणि इलाखे आहेत. म्हणजे अल्लाहच्या मार्गात थोडा किंवा जास्त, जेवढापण खर्च कराल, अशाचप्रकारे जितकी मैदाने किंवा इलाखे पार कराल, (म्हणजे जिहाद मध्ये थोडा किंवा जास्त जो पण प्रवास कराल,) ही सर्व पुण्याची कामे तुमच्या कर्मपटांत, नोंदविली जातील. ज्यावर अल्लाहतआला चांगल्यांत चांगला मोबदला देईल.

११) काही भाष्यकारांजवळ याचा संबंध सुद्धा जिहादशी आहे. आणि तात्पर्य हे आहे की, मागील महावाक्यांमध्ये, जेव्हा मागे राहून जाणाऱ्यांसाठी कडक चेतावणी आणि कानउघाडणी वर्णन करण्यांत आली, तेव्हा सहाबा कराम رضي الله عنهم फारच सावध होऊन गेले, आणि जेव्हांही जिहादचा प्रसंग येई, त्यांत सर्वच्या सर्व सहभागी होण्याचा प्रयत्न करीत, महावाक्यांत त्यांना हुकूम देण्यांत आला की, प्रत्येक जिहाद अशा प्रकारचे नसते की, ज्यांत प्रत्येक माणसाने सहभागी व्हावे, याची आवश्यकता नसते; (जसे की तबूकमध्ये होते.) किंबहुना एका गटाचाच सहभाग पुरेसा आहे. त्यांचेजवळ 'लेयतफक्कहु' चा संबोधित मागे राहून जाणाऱ्यांचा एग गट आहे. म्हणजे एका गटाने जिहादमध्ये चालले जावे; 'व तबका ताईफतून' (हे महजूफ असेल) आणि एका गटाने मागे रहावे, ज्यांनी धर्माचे ज्ञान मिळवावे. आणि जेव्हा धर्मयोद्धे परत येतील, तेव्हा त्यांना सुद्धा धर्माच्या आदेशांची माहिती देऊन त्यांना भिववावे. दुसरे भाष्य त्याचे असे आहे की, या महावाक्याचा संबंध जिहादशी नाही; किंबहुना याच्यांत धर्माचे ज्ञान शिकण्याच्या महत्त्वाचे वर्णन, याला प्रोत्साहन, आणि पद्धतीचा खुलासा आहे; आणि तो हा की, प्रत्येक मोठ्या समुहातून, किंवा घराण्यातून, काही लोकांनी धर्माचे ज्ञान मिळविण्यासाठी, आपले घरदार सोडावे, आणि (धर्म) ज्ञानाच्या पाठशाळा आणि केंद्रे, यांच्यात जाऊन त्याला प्राप्त करावे. आणि मग येऊन आपल्या लोकांत, हितोपदेश करावा. धर्मांत समजबुझ प्राप्त करण्याचे तात्पर्य, काय करावयाचे आहे आणि काय करावयाचे नाही (अमर व नवाही) याचे ज्ञान प्राप्त करणे आहे. कारण की, अल्लाहच्या आदेशांची अंमलबजावणी केली जाऊ शकावी. आणि मना केलेल्या गोष्टींपासून (स्वत:ला) वाचवून ठेवावे; आणि आपल्या लोकांत सुद्धा, भलाईचा हुकूम करणे. आणि वाईट गोष्टींपासून मना करण्याचे कर्तव्य पार पाडले जावे.

يَاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا قَاتِلُوا الَّذِيْنَ يَلُوْنَكُمْ مِّنَ الْكُفَّارِ وَلْيَجِدُوْا فِيْكُمْ غِلْظَةً ؕ وَاعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ مَعَ الْمُتَّقِيْنَ ۝١٢٣

**अहो ईमानवाल्यांनो! त्या काफिरांशी लढा, जे तुमच्या जवळपास आहेत[१]. आणि त्यांना तुमच्यात उग्रता आढळून आली पाहिजे[२]. आणि हा विश्वास बाळगा की, अल्लाहतआला, त्याला भिऊन वागणाऱ्यांच्या बरोबर आहे.**(१२३)

وَاِذَا مَآ اُنْزِلَتْ سُوْرَةٌ فَمِنْهُمْ مَّنْ يَّقُوْلُ اَيُّكُمْ زَادَتْهُ هٰذِهٖٓ اِيْمَانًا ۚ فَاَمَّا الَّذِيْنَ اٰمَنُوْا فَزَادَتْهُمْ اِيْمَانًا وَّهُمْ يَسْتَبْشِرُوْنَ ۝١٢٤

**आणि जेव्हा कोणी अध्याय प्रकट केला जातो, तेव्हा काही दांभिक म्हणतात की, या अध्यायाने तुमच्यातून कोणाच्या ईमानांत प्रगती झाली आहे[३]? तर जे लोक ईमानवाले आहेत, या अध्यायाने त्यांच्या ईमानांत प्रगती झाली आहे, आणि ते आनंदीत होत आहेत[४]** (१२४)

وَاَمَّا الَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ فَزَادَتْهُمْ رِجْسًا اِلٰى رِجْسِهِمْ وَمَاتُوْا وَهُمْ كٰفِرُوْنَ ۝١٢٥

**आणि ज्यांच्या मनांत रोग आहे, या अध्यायाने त्यांच्यात, त्यांच्या मलिनतेत आणखी मलिनता वाढवून दिली; आणि ते कुफ्रावस्थेतच मरून गेले[५]** (१२५)

اَوَلَا يَرَوْنَ اَنَّهُمْ يُفْتَنُوْنَ فِيْ كُلِّ عَامٍ مَّرَّةً اَوْ مَرَّتَيْنِ ثُمَّ لَا يَتُوْبُوْنَ وَلَا هُمْ يَذَّكَّرُوْنَ ۝١٢٦

**आणि काय यांना दिसत नाही, की हे लोक दरवर्षी एकदा, किंवा दोनदा कोण्या ना कोण्या संकटात सापडत राहतात[६]; तरी सुद्धा न प्रायश्चित्त करतात न काही उपदेश घेतात.** (१२६)

وَاِذَا مَآ اُنْزِلَتْ سُوْرَةٌ نَّظَرَ بَعْضُهُمْ اِلٰى بَعْضٍ ؕ هَلْ يَرٰىكُمْ مِّنْ اَحَدٍ ثُمَّ انْصَرَفُوْا ؕ صَرَفَ اللّٰهُ قُلُوْبَهُمْ بِاَنَّهُمْ قَوْمٌ لَّا يَفْقَهُوْنَ ۝١٢٧

**आणि जेव्हा कोणी अध्याय अवविर्ण केला जातो, तर एक दुसऱ्याला बघू लागतात की, तुम्हास कोणी पहात तर नाही; मग चालू लागतात[७]. अल्लाहतआलाने त्यांचे मन फिरवून टाकले आहे, यासाठी की ते निव्वळ नासमझ लोक आहेत[८]** (१२७)

لَقَدْ جَآءَكُمْ رَسُوْلٌ مِّنْ اَنْفُسِكُمْ عَزِيْزٌ عَلَيْهِ مَا عَنِتُّمْ حَرِيْصٌ عَلَيْكُمْ بِالْمُؤْمِنِيْنَ رَءُوْفٌ رَّحِيْمٌ ۝١٢٨

**तुमच्याजवळ एक असे पैगंबर आले आहेत, जे तुमच्यातूनच आहेत[९]; ज्यांना तुमच्या दु:खाची गोष्ट फारच जड वाटते[१०]. जे तुमच्या कल्याणाचे मोठेच इच्छुक राहतात[११]. ईमानवाल्या बरोबर अतिशय करूणामय आणि दयाळू आहेत[१२]** (१२८)

فَاِنْ تَوَلَّوْا فَقُلْ حَسْبِيَ اللّٰهُ ۖ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ؕ عَلَيْهِ تَوَكَّلْتُ وَهُوَ رَبُّ الْعَرْشِ الْعَظِيْمِ ۝١٢٩

**यावरही हे लोक जर तोंड फिरवतील[१३], तर आपण सांगून टाका की, माझ्यासाठी अल्लाह पुरेसा आहे[१४]. त्याच्यावाचून अन्य कोणी उपास्य नाही; मी त्याच्यावर भरोसा केला, आणि तो मोठ्या अर्षचा (महा सिंहासनाचा) मालक आहे[१५].** (१२९)

१) येथे काफिरांशी लढण्याचे एक महत्त्वाचे तत्त्व सांगण्यात आले आहे. 'अलअव्वल फलअव्वल' आणि 'अलअ करब फलअ करब' च्या प्रमाणे काफिरांशी जिहाद करावयाचे आहे; जसे की, रसूलुल्लाह ﷺ नी, प्रथम अरबी द्विपकल्पात वस्ती केलेल्या मुशरिकांशी युद्ध केले; जेव्हा त्यांच्या पासून मोकळे झाले, आणि अल्लाहतआलाने, मक्का, ताईफ, यमन, यमामा, हिज्र, खैबर, हजरमूत वगैरे, राज्यांवर मुसलमानांना वर्चस्व मिळवून दिले; आणि अरबची सारी घराणी, सैन्या सैन्याने इस्लाममध्ये दाखल होऊन गेलीत; तेव्हा मग ज्या वेळी प्रसंग पडला ग्रंथधारी लोकांशी युद्धाचा प्रारंभ सुरु केला. आणि ९ हिजरीमध्ये, रोमनांशी युद्ध करण्यासाठी, तबूकला गेलेत, जे अरब द्विपकल्पाजवळ आहे. याचप्रमाणे आपण ﷺ च्या मृत्युनंतर, खुलफा-ए-राशीदीन ने आवश्क्ता वाटल्या रोमच्या खिस्त्यांशी युद्ध केले आणि इराणच्या अग्नीपुजकांशी युद्ध केले.

२) म्हणजे काफिरांसाठी, मुसलमानांच्या मनांत, मृदुता नव्हे कठोरता असावयास हवी; जसे की, ''अशिद्दाओ अलल कुफ्फारि, रूहामाऊ बैनहुम'' असे सहाबा करामचे वैशिष्टय सांगण्यात आले. याचप्रमाणे ''अज़िल्लतिन अलल मोमेनीन अइज्जतीन अलल काफेरीन'' (सू. माईद: ५४)ईमानवाल्याचे वैशिष्ट्य आहे.

३) या अध्यायांत दांभिकांच्या कर्तृत्वावरून पडदा उचलण्यात आला आहे. हे महावाक्य, त्याचे बाकी राहिलेले आणि

शेवटचा भाग आहे. यात दाखवून देण्यात येत आहे की, जेव्हा यांच्या अनुपस्थितीत, कोणी अध्याय, किंवा त्याचा काही भाग, अवतरीत झाला, आणि त्यांना हे समजले, तर हे टिंगल टवाळीच्या स्वरूपांत, आपसांत एक दुसऱ्याला म्हणत असत की, यामुळे तुमच्यातून कोणाच्या ईमानांत वाढ झाली?

४) अल्लाहतआलाने म्हटले, जोपण अध्याय अवतरीत होत असतो. त्यामुळे ईमानवाल्यांच्या ईमाना मध्ये नक्कीच वाढ होत असते. आणि ते आपल्या ईमानाच्या वाढीवर आनंदित होत असतात. हे महा वाक्य पण या गोष्टीला प्रमाण आहे की, ईमानांत कमी जास्त होत असते, ज्याप्रकारे की मोहद्दीसीनचा मसलक आहे.

५) रोगाने अभिप्रेत दांभिकत्व, आणि अल्लाहच्या महावाक्यात शंका कुशंका घेणे आहे. सांगितले गेले, हा अध्याय दांभिकांच्या, दांभिकत्वांत आणि मलिनतेत आणखी वाढ करतो. आणि ते आपल्या कुफ्र आणि दांभिकत्वात अशाप्रकारे पक्के होऊन जातात की, त्यांना तौबा करण्याची सुबुद्धी होत नाही. आणि कुफ्रवरच त्यांचा शेवट होतो. ज्याप्रमाणे अल्लाहतआलाने दुसऱ्या ठिकाणी सांगितले की, ''आम्ही कुरआनांत अशा गोष्टी अवतीर्ण करतो की, ज्या ईमानवाल्यांसाठी, रोगमुक्ती आणि दया आहेत. परंतु अल्लाहतआला या (गोष्टी) मुळे जालीमांच्या घाट्यात वृद्धीच करतो.'' (सू.बनी इस्राईल-८२) ही जणू त्यांच्या त्यांच्या दुर्भाग्याची परिसीमा आहे की, ज्यामुळे लोकांची अंत:करणे, मार्गदर्शन मिळवितात, त्याच गोष्टी यांच्या फजितीला आणि नाश होण्याला कारणीभूत होतात. ज्याप्रमाणे कोण्या मनुष्याची प्रकृती आणि पोट खराब होऊन जाते, तर तेच अन्न, ज्यामुळे लोकांना शक्ती आणि स्वाद मिळतो, त्याच्या रोगांत आणखी बिघाड आणि खराबीला कारणीभूत होते.

६) 'युफ्तनून' चा अर्थ आहे, आजमाविण्यात येतात. संकटाने अभिप्रेत एक तर आकाशी संकटे आहेत उदाहरणार्थ दुष्काळ वगैरे (परंतु हे दुरवरचे आहे.) किंवा शारीरिक आजार आणि त्रास आहेत. किंवा युद्ध आहेत, ज्यांत सहभागाने त्यांची कसोटी घेण्यात येत असते. विषयाच्या अनुषंगाने हे जास्त बरोबर आहे.

७) म्हणजे त्यांच्या उपस्थितीत अध्याय अवतरीत झाला की, ज्यात दांभिकांच्या खोडसाळपणा आणि कट कारस्थानांकडे इशारा असला; तर मग हे पाहून की, मुसलमान त्यांना पाहत तर नाही, गुपचूप सटकून जात.

८) म्हणजे अल्लाहच्या महावाक्यांत चिंतन आणि मनन न केल्यामुळे, अल्लाहने त्यांच्या अंत:करणाला, भलाई आणि मार्गदर्शनापासून, फिरवून टाकले आहे.

९) अध्यायाच्या शेवटी मुसलमानांवर, नबी ﷺ च्या रुपात, जो मोठा उपकार करण्यांत आला आहे, त्याचा उल्लेख करण्यात येत आहे. आपले ﷺ पहिले वैशिष्टय हे सांगण्यांत आले आहे की, तुमच्या जातीतून म्हणजे मनुष्य जातीतूनच आहेत. (ते नूर किंवा आणखी काही नाहीत) जसे की, बिघडलेल्या श्रद्धेला बळी पडलेले लोक, जनतेला अशा प्रकारच्या गोरख धंद्यात फसवितात.

१०) 'अनत' अशा गोष्टी ज्यांच्यापासून माणसाला त्रास व्हावा, यांत ऐहिक परिश्रम आणि पारलौकीक शिक्षा दोघांचा समावेश आहे. या पैगंबरावर, तुमचा प्रत्येक प्रकारचा त्रास, परिश्रम फारच भारी पडतो. याचसाठी आपण ﷺ नी फर्माविले, ''मी सोपा, खरा धर्म घेऊन पाठविण्यात आलो आहे.'' (मुसनद अहमद ) एका आणखी हदीसमध्ये फर्माविले ''नि:संशय हा धर्म सोपा आहे.'' (स.बुखारी किताबुल ईमान)

११) तुमचे मार्गदर्शन आणि तुमच्या ऐहिक आणि पारलौकीक नफ्याचे इच्छुक आहेत. आणि तुमचे नरकाग्नीत जाणे पसंत करीत नाहीत. याचसाठी आपण ﷺ नी फर्माविले, ''मी तुमच्या कंबरांना धरून धरून (मागे) ओढतो परंतु तुम्ही माझ्यापासून सुटका करून, जबरदस्तीने नरकाग्नीच्या आगीत दाखल होतात.'' (स.बुखारी,)

१२) हे आपले चौथे वैशिष्टय सांगण्यांत येत आहे. या सर्व खुब्या आपले उच्च चारित्र्य आणि कनवाळूंवृत्तीचे निदर्शक आहेत. खचित्‌च आपण ﷺ उच्च चारित्र्याचे धनी आहेत. सल्लल्लाहु अलैहि व सल्लम.

१३) म्हणजे आपण आणलेले धर्मशास्त्र.

१४) जो कुफ्र आणि आक्षेप घेणाऱ्यांच्या धोक्याच्या चालीपासून मला वांचवून घेईल.

१५) ह. अबुदर्दा رضي الله عنه फर्मावितात, जो मनुष्य हे महावाक्य (हसबी यल्लाहु) सकाळ संध्याकाळ सात सात वेळेला म्हणेल, अल्लाहतआला त्याच्या काळज्या आणि अडचणींना पुरेसा होऊन जाईल. (सुनन अबुदाऊद क्र.५०८१)

महावाक्ये १०९ | रुकूअ ११

# (१०) सू. यूनुस

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اٰيَاتُهَا ١٠٩ (١٠) سُوْرَةُ يُوْنُسَ مَكِّيَّةٌ (٥١) رُكُوْعَاتُهَا ١١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

अलीफ-लाम-रा ही ज्ञानपुर्ण पुस्तकाची महावाक्ये आहेत[१] (१)

الٓرٰ تِلْكَ اٰيٰتُ الْكِتٰبِ الْحَكِيْمِ ①

काय या लोकांना या गोष्टीचे आश्चर्य[२] वाटले की, आम्ही यांच्यातून एका माणसाजवळ वह्य पाठवून दिले की, सर्व माणसांना भिववावे; आणि जे ईमान आणतील, त्यांना हे शुभवार्ता ऐकवावे की, त्यांच्या पालनकर्त्याजवळ त्यांचा मोठा मान मर्तबा राहील[३]. काफिरांनी म्हटले की, हा मनुष्य तर नि:संशय उघड उघड जादूगीर आहे[४]. (२)

اَكَانَ لِلنَّاسِ عَجَبًا اَنْ اَوْحَيْنَآ اِلٰى رَجُلٍ مِّنْهُمْ اَنْ
اَنْذِرِ النَّاسَ وَبَشِّرِ الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَنَّ لَهُمْ قَدَمَ
صِدْقٍ عِنْدَ رَبِّهِمْ ؔ قَالَ الْكٰفِرُوْنَ اِنَّ هٰذَا
لَسٰحِرٌ مُّبِيْنٌ ②

नि:संशय तुमचा पालनकर्ता अल्लाहच आहे; ज्याने आकाशांना आणि पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले; मग महा सिंहासनावर विराजमान झाला[५]. तो प्रत्येक कामाची व्यवस्था करीत असतो[६]. त्याच्या परवानगी वाचून कोणी त्याच्याजवळ शिफारस करणारा नाही[७]. असा अल्लाह तुमचा पालनकर्ता आहे. म्हणून तुम्ही त्याची उपासना [८] करा. तर काय तुम्ही तरी सुद्धा उपदेश घेत नाही. (३)

اِنَّ رَبَّكُمُ اللّٰهُ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ فِيْ
سِتَّةِ اَيَّامٍ ثُمَّ اسْتَوٰى عَلَى الْعَرْشِ يُدَبِّرُ الْاَمْرَ ؕ مَا
مِنْ شَفِيْعٍ اِلَّا مِنْۢ بَعْدِ اِذْنِهٖ ؕ ذٰلِكُمُ اللّٰهُ رَبُّكُمْ
فَاعْبُدُوْهُ ؕ اَفَلَا تَذَكَّرُوْنَ ③

तुम्हा सर्वांस अल्लाहच्या जवळ जाणे आहे. अल्लाहने खरा वायदा करून ठेवला आहे; नि:संशय तोच पहिल्यावेळी पण निर्माण करतो, मग तोच दुसऱ्यांदा पण निर्माण करील. कारण की, अशा लोकांना ज्यांनी ईमान आणले, आणि त्यांनी चांगली कामे केली, न्यायाने मोबदला द्यावा; आणि ज्या लोकांनी कुफ्र केले, त्यांच्यासाठी उकळते पाणी प्यावयास मिळेल आणि दु:खदायक शिक्षा होईल, त्यांच्या कुफ्रमुळे[९] (४)

اِلَيْهِ مَرْجِعُكُمْ جَمِيْعًا ؕ وَعْدَ اللّٰهِ حَقًّا ؕ اِنَّهٗ يَبْدَؤُا
الْخَلْقَ ثُمَّ يُعِيْدُهٗ لِيَجْزِيَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ
بِالْقِسْطِ ؕ وَالَّذِيْنَ كَفَرُوْا لَهُمْ شَرَابٌ مِّنْ حَمِيْمٍ
وَّعَذَابٌ اَلِيْمٌۢ بِمَا كَانُوْا يَكْفُرُوْنَ ④

तो अल्लाहतआला असा आहे, ज्याने सूर्याला प्रकाशित बनविले.आणि चंद्राला तेजस्वी बनविले[१०]; आणि त्याच्यासाठी कला निश्चित केल्या; कारण की, तुम्ही वर्षाचा हिशेब आणि मोजणी माहित करून घेत जावी[११]. अल्लाहतआलाने या गोष्टी निरर्थक बनविल्या नाहीत. तो ही प्रमाणे यांना स्पष्ट स्पष्ट दाखवित आहे; जे लोक समजतात (५)

هُوَ الَّذِيْ جَعَلَ الشَّمْسَ ضِيَآءً وَّالْقَمَرَ نُوْرًا وَّقَدَّرَهٗ
مَنَازِلَ لِتَعْلَمُوْا عَدَدَ السِّنِيْنَ وَالْحِسَابَ ؕ
مَا خَلَقَ اللّٰهُ ذٰلِكَ اِلَّا بِالْحَقِّ ۚ يُفَصِّلُ الْاٰيٰتِ لِقَوْمٍ
يَّعْلَمُوْنَ ⑤

सू.यूनुस, हा अध्याय मक्केत अवतीर्ण झाला. तथापि याची दोन महावाक्ये आणि काही च्या म्हणण्याप्रमाणे तीन महावाक्ये मदीनेत प्रकट झाली, असे म्हटले आहे. (फत्हुल कदीर)

१) 'अल् हकीम' पुस्तक म्हणजे कुरआनाचे विशेषण आहे. याचा एक तर तोच अर्थ आहे,जो भाषांतरात अंगीकारण्यांत आला आहे. त्याचे आणखीही अर्थ केले गेले आहेत. उदाहरणार्थ 'अलमुहकम' म्हणजे हलाल व हराम आणि आदेशांच्या मर्यादांत, निर्णायक (मजबूत) आहे. हकीम, हाकिमच्या अर्थात म्हणजे मतभेदांमध्ये, लोकांच्या दरम्यान निर्णय करणारे पुस्तक (सू.अल् बकर : २३) हकीम, महकुम फिहा च्या अर्थात म्हणजे अल्लाहतआलाने याच्यांत न्याय निवाड्यासह, निर्णय केले आहेत. सर्व भावार्थ, आपआपल्या जागी बरोबर आहेत.

२)नकारात्मक विचारणे आश्चर्य दाखविण्यासाठीआहे. ज्यात कानउघाडणीचा पण भाग शामील आहे. म्हणजे या गोष्टीवर आश्चर्य वाटावयांस नको की, अल्लाहतआलाने मनुष्य मात्रामधूनच, एका माणसालाच, 'वह्य' आणि पैगंबरीसाठी निवडून घेतले; कारण की त्यांच्याच जातीमधून असल्यामुळे, तो खऱ्या अर्थाने त्यांचे मार्गदर्शन करूंशकतो. जर तो दुसऱ्या कोण्या जातीतून असता, जर देवदूत किंवा जिन्न असता, तर दोन्हीही स्वरूपांत, पैगंबरीचा मूळ उद्देश नाहीसा झाला असता; यासाठी की, मनुष्य मात्र त्याच्याशी परिचित होण्याऐवजी, त्यांना (त्यांची) भीती वाटली असती. दुसरे असे की, त्यांच्याकरिता त्याला पाहणे पण शक्य झाले नसते. आणि जर आम्ही कोण्या जिन्न किंवा देवदुताला, मानवाच्या रूपात पाठवतो, तर पुन्हा तोच आक्षेप घेतला गेला असतां की, हा तर आमच्या सारखाच एक मनुष्य आहे. म्हणून यांच्या आश्चर्य वाटण्यात काही परिपूर्णता नाही.

३) 'कदम सिदकीन्' चा अर्थ, उच्च मानमर्तबा, चांगलेप्रतिफल, आणि ती सुकृत्ये आहेत, जी एक ईमानवाला पुढेपाठवत असतो.

४) काफिरांना जेव्हा नाकारण्यासाठी, आणखी कोणी गोष्ट सुचली नाही, तर असे सांगून मोकळे होत असत, की हा तर जादूगीर आहे! नऊजो बिल्लाह!
५) याच्या खुलाशासाठी पहा,सू.आअ्राफ आ.५४ चा समास, पृ.२०५ समास-५
६) म्हणजे आकाश आणि पृथ्वीची निर्मिती करून, त्याने त्यांना असेच सोडून दिले नाही, किंबहुना साऱ्या विश्वाची कार्यव्यवस्था तो अशाप्रकारे करीत आहे की, कधी कोणाचा आपसांत टकराव झाला नाही. प्रत्येक वस्तू त्याच्या हुकूमावर, आपआपल्या कामांत व्यस्त आहे.
७) मुशरिकीन आणि काफिर, जे खरे संबोधित होते, त्यांची श्रद्धा होती की, या मुर्त्या, ज्यांची ते भक्ती करीत होते, अल्लाहजवळ त्यांची शिफारस करतील; आणि त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वाचवतील. अल्लाहतआलाने फर्माविले, तेथे अल्लाहच्या परवानगीशिवाय, कोणाला शिफारस करण्याची परवानगीच असणार नाही. आणि ही परवानगी सुद्धा फक्त त्याच लोकांसाठी राहील, ज्यांच्याकरीता अल्लाहतआला पसंत करेन. ''शिफारस करणार नाहीत, त्यांच्याशिवाय ज्याच्याशी अल्लाह खूष झाला'' (सू.अंबिया-२८)''त्यांची शिफारस काहीही नफा देऊं शकत नाही, परंतु ही वेगळी गोष्ट आहे की, अल्लाहतआला आपल्या खुषीने आणि इच्छेने, ज्याच्यासाठी इच्छेल, परवानगी देऊन देईल.''(सू.नज्म-२६)
८) म्हणजे अल्लाह जो या विश्वाचा निर्माता सुद्धा आहे आणि त्याचा प्रबंधक आणि व्यवस्थापक देखील, याशिवाय सर्व अधिकारांचापण संपूर्णपणे तोच मालक आहे. तोच या योग्यतेचा आहे की, त्याचीच भक्ती केली जावी.
९) या महावाक्यांमध्ये कयामतचे घडून येणे, अल्लाहच्या समक्ष सर्वांची उपस्थिती, आणि मोबदला व शिक्षेचे वर्णन आहे. हा विषय, कुरआन करीममध्ये, निरनिराळ्या पद्धती, अनेक ठिकाणी सांगण्यात आला आहे. कयामतचा दिवस असा असेल, ज्यात अल्लाहच्या न्याय निवाड्याची व्यवस्था असेल. कारण की, आम्ही बघतो की, काही वेळा एक मनुष्य, जो अल्लाहचा सक्त आज्ञाभंजक असतो, तो सुखासमाधानाचे आणि आरामाचे जीवन जगून, या जगांतून पसार होतो. आणि या जगांत त्याला कसलीही शिक्षा होत नाही. याचप्रमाणे एका पुण्यवान माणसाला, त्याच्या पुण्याचा बदला जगांत मिळत नाही. कयामतच्या दिवशी प्रत्येक पुण्यवान आणि पापी माणसाला त्याच्या कर्माप्रमाणे प्रतिफळ मिळेल. जर मोबदला आणि शिक्षेचा हा दिवस नसतां, तर खचित्च जुलूम झाला असता की, पुण्यवानाला पुण्याचा बदला, आणि पाप्याला पापाची शिक्षाच न मिळती. जेव्हा की अल्लाहतआला सेवकांवर जुलूम करणारा नाही.
१०) मिजाफ येथे महजूफ आहे. सूर्याला चमकदार आणि चंद्राला तेजस्वी बनविले. किंवा मग त्यांना अतिशयोक्तीने म्हटले जाईल, जणू ते स्वत: चमकदार आणि तेजस्वी आहेत. आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, आणि त्यांच्या व्यवस्थेच्या उल्लेखानंतर, उदाहरण म्हणून आणखी काही वस्तूंचा उल्लेख केला जात आहे; ज्यांचा संबंध विश्वाच्या व्यवस्थेशी आहे. ज्यामध्ये सूर्याला आणि चंद्राला आधारभूत महत्त्व प्राप्त झाले आहे. सूर्याची उष्णता आणि त्याचा प्रकाश, कशाप्रकारे आवश्यक आहे. याला प्रत्येक जाणकार मनुष्य परिचीत आहे. अशाचप्रकारे चंद्राच्या प्रकाशाचा जो आनंद, आणि त्याचे जे फायदे आहेत, तेही वर्णन करूनच सांगावयास पाहिजे, असे नाही. शास्त्रज्ञांचे म्हणणे आहे की, सूर्य स्वयंप्रकाशितच आहे. आणि चंद्राचा प्रकाश, दुसऱ्यावर अवलंबून आहे, जो सूर्यप्रकाशापासून मिळविलेला आहे. (फतहुल कदीर) वल्लाह् आलम बिस् सवाब्!
११) म्हणजे आम्ही चंद्राच्या चालीच्या कला, निश्चित करून दिल्या आहेत. या कलांनी अभिप्रेत, ते अंतर आहे, जे तो एका रात्रीत आणि एका दिवसात आपल्या विशिष्ट चालण्याच्या गतीने पार करतो. या २८ कला आहेत. प्रत्येक रात्रीत एका कलेवर पोहचतो; ज्यांत काही चूक होत नाही. पहिल्या कलांमध्ये तो लहान आणि बारीक दिसतो. मग हळू हळू मोठा होत जातो. येथ पावेतो की, चौदाव्या रात्री किंवा चौदाव्या कलेवर, तो पूर्ण (परीपूर्ण) होऊन जातो. याच्यानंतर मग ते संकुचित आणि बारीक होणे, सुरू होऊन जाते. येथपावेतो की, शेवटच्या एक किंवा दोन रात्री तो लपलेला राहतो. आणि मग हिलाल (पहिल्या दिवसाची चंद्रकोर) बनून उदय पावतो. याचा फायदा हा सांगण्यांत आला आहे की, तुम्ही वर्षाची मोजणी आणि हिशेब माहित करून घ्यावा. म्हणजे चंद्राच्या या कला आणि चालीनेच महिने आणि वर्ष बनतात; ज्यामुळे तुम्हांस प्रत्येक गोष्टीचा हिशेब, करण्यांत सोपे जाते म्हणजे वर्ष १२ महिन्यांचे, महिना २९,३० दिवसांचा, एक दिवस २४ तासांचा, म्हणजे रात्र आणि दिवसाचा जे समानतेचे दिवसात, १२,१२ तास, आणि हिवाळ्यांत, उन्हाळ्यात कमी जास्त होत राहतात. याशिवाय ऐहिक फायदे आणि व्यवहारपण, या चंद्राच्या कलांशी संबंधीत नाहीत, धार्मिक फायदेपण यापासून प्राप्त होतात. याच चंद्रकोरीच्या उदय होण्याने, हज,रमजानचे उपवास, आदर सन्मानाचे महिने, आणि दुसऱ्या उपासनांची निश्चिती होते. ज्याचे पालन एक ईमान वाला (मोमिन) करत असतो.

اِنَّ فِی اخْتِلَافِ الَّیْلِ وَالنَّهَارِ وَمَا خَلَقَ اللّٰهُ فِی السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ لَاٰیٰتٍ لِّقَوْمٍ یَّتَّقُوْنَ ﴿٦﴾

**नि:संशय दिवसाच्या आणि रात्रीच्या अनुक्रमांत, आणि अल्लाहतआलाने जे काही, आकाशात आणि पृथ्वीत निर्माण केले आहे, या सर्वांत, त्या लोकांसाठी प्रमाणे आहेत, जे अल्लाहचे भय बाळगतात. (६)**

اِنَّ الَّذِیْنَ لَا یَرْجُوْنَ لِقَآءَنَا وَرَضُوْا بِالْحَیٰوةِ الدُّنْیَا وَاطْمَاَنُّوْا بِهَا وَالَّذِیْنَ هُمْ عَنْ اٰیٰتِنَا غٰفِلُوْنَ ﴿٧﴾

**ज्या लोकांना आमच्याजवळ येण्याचा विश्वास नाही, आणि ते ऐहिक आयुष्यावर खूष होऊन गेले आहेत, आणि त्यांत जीव गुंतवून बसले आहेत, आणि जे लोक आमच्या निशाण्यांकडून गाफिल आहेत (७)**

اُولٰٓئِكَ مَاْوٰىهُمُ النَّارُ بِمَا كَانُوْا یَكْسِبُوْنَ ﴿٨﴾

**अशा लोकांचे ठिकाण, त्यांच्या कर्मांमुळे नरकाग्नी आहे. (८)**

اِنَّ الَّذِیْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ یَهْدِیْهِمْ رَبُّهُمْ بِاِیْمَانِهِمْ ۚ تَجْرِیْ مِنْ تَحْتِهِمُ الْاَنْهٰرُ فِیْ جَنّٰتِ النَّعِیْمِ ﴿٩﴾

**खचितच ज्या लोकांनी ईमान आणले, आणि त्यांनी चांगली कामे केलीत; त्यांना त्यांचा पालनकर्ता (ते) विश्वासू (मोमिन) असल्यामुळे, त्यांच्या उद्देश्यापर्यंत पोहचवूंन देईल[१]. नेअमतच्या बागेत, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वाहत असतील. (९)**

دَعْوٰىهُمْ فِیْهَا سُبْحٰنَكَ اللّٰهُمَّ وَتَحِیَّتُهُمْ فِیْهَا سَلٰمٌ ۚ وَاٰخِرُ دَعْوٰىهُمْ اَنِ الْحَمْدُ لِلّٰهِ رَبِّ الْعٰلَمِیْنَ ﴿١٠﴾

**त्यांच्या तोंडून ही गोष्ट निघेल 'सुबहाना कल्ला हुम्मा[२]' (म्हणजे हे अल्लाह ' तू पवित्र आहेस) आणि त्यांचा आपसातील सलाम हा असेल, 'अस्सलाम अलैकुम[३]' आणि त्यांची शेवटची गोष्ट ही असेल, सर्व स्तुती अल्लाहकरीता आहे, जो साऱ्या जगाचा पालनकर्ता आहे. (१०)**

وَلَوْ یُعَجِّلُ اللّٰهُ لِلنَّاسِ الشَّرَّ اسْتِعْجَالَهُمْ بِالْخَیْرِ لَقُضِیَ اِلَیْهِمْ اَجَلُهُمْ ؕ فَنَذَرُ الَّذِیْنَ لَا یَرْجُوْنَ لِقَآءَنَا فِیْ طُغْیَانِهِمْ یَعْمَهُوْنَ ﴿١١﴾

**आणि जर अल्लाह लोकांवर, त्यांना नुकसान पोहचविण्याची घाई करीत राहता, ज्याप्रमाणे ते फायद्यांकरीता घाई करीत असतात, तर त्यांचा वायदा कधीचा येऊन चुकला असता[४]. म्हणून आम्ही, त्या लोकांना, ज्यांना आमच्याजवळ येण्याचा विश्वास नाही, त्यांच्या स्थितीवर सोडून ठेवतो; की त्यांनी आपल्या शिरजोरीत भटकत रहावे (११)**

१) याचा दुसरा एक अर्थ हा केला गेला आहे की, या जगांत ईमानामुळे कयामतच्या दिवशी, अल्लाहतआला यांच्यासाठी पुलसिरातवरून पार होणे सुलभ करून देईल. काहींच्या जवळ हे मदतीसाठी आहे. आणि अर्थ हा होईल की, अल्लाहतआला कयामतच्या दिवशी, त्यांच्याकरता एका तेजाची सोय करेल, ज्याच्या प्रकाशांत ते चालतील; जसे की, सू.हदीद मध्ये याचा उल्लेख येतो.

२) म्हणजे स्वर्गवाले, नेहमी अल्लाहच्या स्तुती आणि प्रशंसेमध्ये मग्न असतील. ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते की, ''स्वर्गवाल्यांच्या मुखातून सुबहानल्लाह् आणि अलहम्दुलिल्लाह्, अशा प्रकारे सहजतेने निघेल, ज्याप्रमाणे श्वासोच्छवास चालत असतो.'' (स.मुस्लीम) म्हणजे ज्याप्रमाणे आपोआप श्वासो च्छवास चालू असतो, त्याचप्रमाणे स्वर्गवाल्यांच्या मुखांतून प्रयत्न केल्यावाचून, अल्लाहतआलाच्या स्तुती आणि पवित्रतेचे गीत आपोआप निघत राहतील.

३) म्हणजे एक दुसऱ्याला अशा प्रकारे सलाम करतील; तसेच देवदूतपण त्यांना सलाम करतील.

४) याचा एक अर्थ तर हे आहे की, ज्याप्रकारे मनुष्य भलाईची इच्छा व्यक्त करण्यांत घाई करीतो; त्याचप्रमाणे तो शिक्षेच्या इच्छेसाठी पण घाई करतो. अल्लाहच्या पैगंबरांना सांगतो की, जर तुम्ही खरे आहात, तर तुम्ही ती शिक्षा घेऊन या, ज्यापासून तुम्ही आम्हाला भिववितात. अल्लाहतआला म्हणतो की, जर आम्ही त्यांच्या मागणीप्रमाणे जलद् शिक्षा पाठवून देतो, तर कधीचे हे मृत्युने नष्ट होऊन गेले असते. परंतु आम्ही त्यांना अवकाश देऊन, त्यांना पूर्ण संधी देत आहोत. दुसरा अर्थ हा आहे की, ज्याप्रमाणे मनुष्य, आपल्यासाठी भलाईची दुआ मागतो, ज्यांना आम्ही मान्य करतो , याचप्रमाणे मनुष्य जेव्हा रागात आणि तंगीत असतो तर आपल्यासाठी आणि आपल्या संतती वगैरेसाठी वाईटाची दुआ करतो. ज्यांना आम्ही यासाठी नजरेआड करून देतो की, हा तोंडाने तर नष्ट मागत आहे, परंतु त्याच्या मनांत असा इरादा नाही. परंतु जर आम्ही, माणसांच्या वाईटांच्या दुआप्रमाणे, त्यांना ताबडतोब नष्ट करून टाकण्याला सुरवात करून टाकू, तर हे लोक लवकरच मृत्यू आणि तबाह बर्बाद होऊन जातील. म्हणूनच हदीसमध्ये येते की, ''तुम्ही आपल्यासाठी, आपल्या संततीसाठी, आणि आपल्या संपत्ती आणि कारभारासाठी, वाईट दुआ मागीत जाऊ नका. कुठे असे न व्हावे की, तुमच्या वाईट दुआ, त्या घटकेत याव्यात, जिच्यात अल्लाहकडून दुआ कबूल केल्या जातांत; मग तो तुमच्या वाईट दुआ कबूल करून टाकेल.'' (सुनन अबु दाऊद, ; व मुस्लीम,)

وَاِذَا مَسَّ الۡاِنۡسَانَ الضُّرُّ دَعَانَا لِجَنۡۢبِهٖۤ اَوۡ قَاعِدًا اَوۡ قَآٮِٕمًا ۚ فَلَمَّا كَشَفۡنَا عَنۡهُ ضُرَّهٗ مَرَّ كَاَنۡ لَّمۡ يَدۡعُنَاۤ اِلٰى ضُرٍّ مَّسَّهٗ ‌ؕ كَذٰلِكَ زُيِّنَ لِلۡمُسۡرِفِيۡنَ مَا كَانُوۡا يَعۡمَلُوۡنَ ﴿١٢﴾

आणि जेव्हा मनुष्याला काही त्रास पोहचतो, तर आमचा धावा करतात, झोपतांना सुद्धा, बसलेले असतांना सुद्धा; उभे असतांना सुध्दा, मग जेव्हा आम्ही त्याचा त्रास, त्यापासून हटवून टाकतो, तर तो असा होऊन जातो की, जणूं त्याने आपल्या त्रासासाठी, जो त्याला झाला होता; कधी आमचा धांवा केलाच नव्हता(१); या मर्यादेबाहेर निघून जाणाऱ्यांची कर्मे, त्यांना अशाचप्रकारे सुशोभित वाटतात(२) ⑫

وَلَقَدۡ اَهۡلَكۡنَا الۡقُرُوۡنَ مِنۡ قَبۡلِكُمۡ لَمَّا ظَلَمُوۡا‌ ۙ وَجَآءَتۡهُمۡ رُسُلُهُمۡ بِالۡبَيِّنٰتِ وَمَا كَانُوۡا لِيُؤۡمِنُوۡا‌ ؕ كَذٰلِكَ نَجۡزِى الۡقَوۡمَ الۡمُجۡرِمِيۡنَ ﴿١٣﴾

आणि आम्ही, तुमच्यापूर्वी, पुष्कळशा समूहांना नष्ट करून टाकले; जेंव्हा त्यांनी जुलूम केला. वास्तविक, त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर सुद्धा प्रमाणे घेऊन आले, ते असे केव्हा होते की, ईमान घेऊन येते? आम्ही अपराध्यांना अशीच शिक्षा देत असतो(३) ⑬

ثُمَّ جَعَلۡنٰكُمۡ خَلٰٓٮِٕفَ فِى الۡاَرۡضِ مِنۡۢ بَعۡدِهِمۡ لِنَـنۡظُرَ كَيۡفَ تَعۡمَلُوۡنَ ﴿١٤﴾

मग त्यांच्यानंतर, आम्ही या जगात, त्यांच्याशिवाय तुम्हाला वसविले(४). यासाठी की, आम्ही पाहून घ्यावे की, तुम्ही कशाप्रकारे कामें करतात ⑭

وَاِذَا تُتۡلٰى عَلَيۡهِمۡ اٰيَاتُنَا بَيِّنٰتٍ‌ ۙ قَالَ الَّذِيۡنَ لَا يَرۡجُوۡنَ لِقَآءَنَا ائۡتِ بِقُرۡاٰنٍ غَيۡرِ هٰذَاۤ اَوۡ بَدِّلۡهُ‌ ؕ قُلۡ مَا يَكُوۡنُ لِىۡۤ اَنۡ اُبَدِّلَهٗ مِنۡ تِلۡقَآئِ نَفۡسِىۡ‌ ۚ اِنۡ اَتَّبِعُ اِلَّا مَا يُوۡحٰۤى اِلَىَّ‌ ۚ اِنِّىۡۤ اَخَافُ اِنۡ عَصَيۡتُ رَبِّىۡ عَذَابَ يَوۡمٍ عَظِيۡمٍ ﴿١٥﴾

आणि जेव्हा यांच्यासमोर, आमची महावाक्ये वाचली जातात; जी(५) एकदम स्पष्ट स्पष्ट आहेत, तेव्हा हे लोक, ज्यांना आमच्याजवळ येण्याचा आशा नाही, असे म्हणतात की, याच्याशिवाय आणखी (कोणी) दुसरे कुरआन आणा(६). किंवा याच्यात काही फेरबदल करून टाका; आपण ﷺ असे सांगून टाका की, मला हा अधिकारच नाही की, मी आपल्याकडून यांच्यात काही फेरबदल करून टाकावा(७). बस! मी तर फक्त त्याचेच अनुपालन करील, जे माझ्याजवळ 'वह्य' च्या मार्फत पोहचले आहे. जर मी आपल्या पालनकर्त्याचे आज्ञाभंजन करीन, तर मला एका मोठ्या दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते(८) ⑮

قُلْ لَّوۡ شَآءَ اللّٰهُ مَا تَلَوۡتُهٗ عَلَيۡكُمۡ وَلَاۤ اَدۡرٰٮكُمۡ بِهٖ ‌ۖ فَقَدۡ لَبِثۡتُ فِيۡكُمۡ عُمُرًا مِّنۡ قَبۡلِهٖ‌ ؕ اَفَلَا تَعۡقِلُوۡنَ ﴿١٦﴾

आपण असे सांगून टाका की, जर अल्लाहला मंजूर असते, तर न तर मी तुम्हाला ते वांचून ऐकविले असते; न अल्लाहतआला तुम्हास याची सूचना देतां(९); कारण की, याच्यापूर्वी सुद्धा, तर मी, आयुष्याचा एक मोठा भाग, तुमच्यात राहून चुकलो आहे; तर काय तुम्ही अक्कल बाळगत नाहीत(१०)? ⑯

فَمَنۡ اَظۡلَمُ مِمَّنِ افۡتَرٰى عَلَى اللّٰهِ كَذِبًا اَوۡ كَذَّبَ بِاٰيٰتِهٖ‌ ؕ اِنَّهٗ لَا يُفۡلِحُ الۡمُجۡرِمُوۡنَ ﴿١٧﴾

तर त्या माणसापेक्षा जास्त कोण जालिम असेल, जो अल्लाहवर खोटा आळ घेईल, किंवा त्याच्या महावाक्यांना खोटे ठरवेल; नि:संशय, अशा अपराध्यांची सफलता होणार नाही. ⑰

وَيَعۡبُدُوۡنَ مِنۡ دُوۡنِ اللّٰهِ مَا لَا يَضُرُّهُمۡ وَلَا يَنۡفَعُهُمۡ وَيَقُوۡلُوۡنَ هٰٓؤُلَاۤءِ شُفَعَآؤُنَا عِنۡدَ اللّٰهِ‌ ؕ قُلۡ اَتُـنَـبِّـئُوۡنَ اللّٰهَ بِمَا لَا يَعۡلَمُ فِى السَّمٰوٰتِ وَلَا فِى الۡاَرۡضِ‌ ؕ سُبۡحٰنَهٗ وَتَعٰلٰى عَمَّا يُشۡرِكُوۡنَ ﴿١٨﴾

आणि हे लोक अल्लाहला सोडून(११), अशा वस्तूंची भक्ती करतात, ज्या न यांचे काही नुकसान करू शकतात, न काही फायदा पोहचवू शकतात(१२). आणि म्हणतात की, हे अल्लाहजवळ आमचे शिफारसकर्ते आहेत(१३). आपण सांगून टाका की, काय तुम्ही अल्लाहला अशा गोष्टीची खबर देता, जी अल्लाहतआलाला ठाऊक नाही; न आकाशांत न पृथ्वीत(१४). तो पवित्र आणि थोर आहे, त्या लोकांच्या शिर्कपासून.(१५) ⑱

१) ही मनुष्याच्या त्या अवस्थेची चर्चा आहे, जी बहुसंख्य मनुष्यांचा दस्तुर आहे. किंबहुना पुष्कळसे, अल्लाहला मानणारे सुद्धां, ही कोताई करीत असतात; की संकटांच्या वेळी तर फारच अल्लाह, अल्लाह केले जाते; दुआ केल्या जातात; पश्चात्ताप (तौबा व इसतग्फार) व्यक्त केला जातो; परंतु जेव्हा अल्लाहतआला संकटाचा तो कठीण काळ

घालवून देतो, तर मग अल्लाहच्या दारी, दुआ आणि व्याकुळतेने धांवा करणे यापासून पण गाफिल होऊन जातात. आणि अल्लाहने त्यांच्या प्रार्थना मान्य करून, ज्या संकटापासून मुक्ती दिली, त्यावर अल्लाहचे आभार मानण्याची पण सुबुद्धी होत नाही.

२) हा कर्माचा सुशोभित पणा, परीक्षा घेण्याच्या उद्देशाने, अल्लाहतआलाकडून पण होऊ शकतो; वसवश्यांमार्फत शैतानाकडून, पण होऊं शकतो. आणि माणसाच्या त्या जातीकडून सुद्धा होऊ शकतो, जो माणसाला वाईट कृत्य करण्याला तयार करतो. ''जीव तर दुष्ट वासनांसाठी प्रवृत्त करीतच असतो.'' (सू.यूसुफ०५३) तथापि त्याला बळी तेच लोक पडतात, जे मर्यादेच्या पलिकडे निघून जातात. म्हणजे अर्थ असा झाला की, त्यांच्या करता दुआ करण्यापासून दुर्लक्ष, अल्लाहचे आभार प्रदर्शन करण्यापासून आळस, आणि वासना आणि मनेच्छेसह व्यस्त होणे, हे सुशोभित करून देण्यांत आले आहे.

३) ही मक्केच्या काफिरांना तंबी आहे की, मागे होऊन गेलेल्या उम्मतीप्रमाणे, तुम्ही सुद्धा नष्ट होऊ शकतात.

४) 'खलाईफ' 'खलीफाचे' अनेकवचन आहे. याचा अर्थ आहे मागे होऊन गेलेल्या उम्मतींचा, वारसदार; किंवा एक दुसऱ्याचे वारसदार

५) म्हणजे जे, अल्लाहतआलाच्या उपास्य आणि एक होण्यावर प्रमाण करते.

६) अर्थ हा आहे की, एकतर या कुरआन मजीदच्या जागी, दुसरे आणावे, किंवा याच्यात आमच्या इच्छेप्रमाणे फेरबदल करून टाकावा.

७) म्हणजे माझ्याकडून दोन्ही गोष्टी शक्य नाही. कारण की, मी यात कुठलाही फेरबदल करण्याला अधिकृत नाही.

८) ही याची आणखी ताकीद आहे. मी तर फक्त या गोष्टीचे अनुकरण करणारा आहे, जे अल्लाहकडून मजवर अवतरीत होते. याच्यात काही कमी जास्त करण्याचा मी प्रयत्न करीन तर मोठ्या दिवसाच्या शिक्षेपासून मी सुरक्षित राहूंशकत नाही.

९) म्हणजे सर्व मामला अल्लाहच्या मर्जीवर अवलंबून आहे. तो इच्छिता तर न मी तुम्हास वांचून ऐकविले असते, न तुम्हांस हे ठाऊकही झाले असते. काहींनी 'अदराकुम् बिही' चा अर्थ, 'अअ्लमकुम् बिही अला लिसानी' असा केला आहे. की तो तुम्हास माझ्या तोंडाने, या कुरआनाबाबत काहीही न सांगता.

१०) आणि तुम्ही पण जाणतात की, पैगंबरीच्या दाव्यापूर्वी, चाळीस वर्षे मी तुम्हात घालविले आहे. काय मी कोण्या गुरुकडून काही शिकलो आहे? याच प्रमाणे तुम्ही माझ्या विश्वसनीयतेचे आणि सत्त्येतेचे पण मानणारे राहिला आहात. काय आता हे शक्य आहे की,मीअल्लाहवर खोटा आळ घेणे सुरु करुन देऊ? अर्थ, या दोन्ही गोष्टींचा हा आहे की कुरआन हे अल्लाहचेच अवतीर्ण केलेले आहे, न मी त्याला कोणापासून ऐकून किंवा शिकून, त्याला सांगत आहे, आणि न असेच खोटेनाटे अल्लाहकडून आहे असे म्हणत आहे.

११) म्हणजे अल्लाहच्या भक्तीपासून भटकून, न तर संपूर्णपणे अल्लाहची भक्ती सोडून, कारण की, मुशरिकीन अल्लाहची भकती कर होते आणि अल्लाहशिवाय इतरांची भक्तीपण करत होते.

१२) जेव्हा की उपास्याची शान ही आहे की, तो आपल्या आज्ञाधारकांना, मोबदला आणि आपल्या आज्ञाभंजकांना शिक्षा देण्याला समर्थ आहे.

१३) म्हणजे त्यांच्या शिफारशींनी, अल्लाह आमच्या आवश्यकता पूर्ण करून देतो. आमचे वाईट चांगले करून देतो. किंवा आमच्या शत्रुंचे झालेले (काम) बिघाडून देतो. म्हणजे मुशरिकीन सुद्धां, अल्लाहला सोडून ज्यांची भक्ती करीत असत, त्यांना नफा नुकसानांत पक्के समजत नसत. किंबहुना आपल्यांत आणि अल्लाहच्या दरम्यान संबंध बनविणारे आणि वशिला समजत असत.

१४) म्हणजे अल्लाहला तर या गोष्टीचे ज्ञान नाही की, त्याचा कोणी सरकतदार पण आहे किंवा त्याच्या दरबारात शिफारशी पण असतील? जणू हे मुशरिकीन, अल्लाहला खबर देतात की, तुला जणूं ठाऊकच नाही. परंतु आम्ही तुला सांगत आहोत की, तुझे सरकतदार पण आहेत. आणि शिफारसकर्ते पण आहेत; जे आपल्यावर श्रद्धा ठेवणाऱ्यांची शिफारस करतील.

१५) अल्लाहतआलाने फर्माविले की, मुशरिकीनच्या या गोष्टी खऱ्या नाहीत. अल्लाहतआला या तमाम गोष्टीपासून पवित्र आणि थोर आहे.

وَمَا كَانَ النَّاسُ إِلَّآ أُمَّةً وَّاحِدَةً فَاخْتَلَفُوْا ۚ وَلَوْلَا كَلِمَةٌ سَبَقَتْ مِنْ رَّبِّكَ لَقُضِيَ بَيْنَهُمْ فِيْمَا فِيْهِ يَخْتَلِفُوْنَ ﴿١٩﴾

आणि सर्व लोक एकाच उम्मतचे होते, मग त्यांनी मतभेद निर्माण करून घेतला[१]; आणि जर एक गोष्ट नसती, जी आपल्या पालनकर्त्याकडून पहिले ठरवून चुकली आहे; तर ज्या गोष्टीत हे लोक मतभेद करीत आहे, त्याचा केव्हाचाच फैसला होऊन चुकला असता[२]. (१९)

وَيَقُوْلُوْنَ لَوْلَآ أُنْزِلَ عَلَيْهِ اٰيَةٌ مِّنْ رَّبِّهٖ ۚ فَقُلْ إِنَّمَا الْغَيْبُ لِلّٰهِ فَانْتَظِرُوْا ۚ إِنِّيْ مَعَكُمْ مِّنَ الْمُنْتَظِرِيْنَ ﴿٢٠﴾

आणि हे लोक असे म्हणतात की, यांच्यावर कोणी चमत्कार का प्रकट झाला नाही[३] ? म्हणून आपण सांगून टाका की, गैबची बातमी फक्त अल्लाहला आहे[४]; म्हणून तुम्ही पण प्रतिक्षा करा, मी पण तुमच्या बरोबर प्रतिक्षा करीत आहे. (२०)

وَإِذَآ أَذَقْنَا النَّاسَ رَحْمَةً مِّنْ بَعْدِ ضَرَّآءَ مَسَّتْهُمْ إِذَا لَهُمْ مَّكْرٌ فِيْٓ اٰيَاتِنَا ۚ قُلِ اللّٰهُ أَسْرَعُ مَكْرًا ۚ إِنَّ رُسُلَنَا يَكْتُبُوْنَ مَا تَمْكُرُوْنَ ﴿٢١﴾

आणि जेव्हा आम्ही लोकांस, त्यांच्यावर काही संकट कोसळले असेल, कोण्या दयेची गोडी चाखवून देतो[५]; तर ते लगेचच आमच्या निशाण्यांच्या बाबतीत खोडकरपणा करू लागतात[६]. आपण सांगून टाका की, अल्लाह डावपेच करण्यात खूप तरबेज आहे[७]. नि:संशय आमचे देवदूत तुमच्या सर्व खोडकर पणाला लिहीत आहेत. (२१)

هُوَ الَّذِيْ يُسَيِّرُكُمْ فِي الْبَرِّ وَالْبَحْرِ ۖ حَتّٰٓى إِذَا كُنْتُمْ فِي الْفُلْكِ ۚ وَجَرَيْنَ بِهِمْ بِرِيْحٍ طَيِّبَةٍ وَّفَرِحُوْا بِهَا جَآءَتْهَا رِيْحٌ عَاصِفٌ وَّجَآءَهُمُ الْمَوْجُ مِنْ كُلِّ مَكَانٍ وَّظَنُّوْٓا أَنَّهُمْ أُحِيْطَ بِهِمْ ۙ دَعَوُا اللّٰهَ مُخْلِصِيْنَ لَهُ الدِّيْنَ ۚ لَئِنْ أَنْجَيْتَنَا مِنْ هٰذِهٖ لَنَكُوْنَنَّ مِنَ الشّٰكِرِيْنَ ﴿٢٢﴾

तो अल्लाह असा आहे की, तुम्हास खुष्की आणि समुद्रात चालवत असतो[८]. येथपावेतो की, जेव्हा तुम्ही गलबतांत असतात; आणि ती गलबते, लोकांना अनुकुल वाऱ्याच्या मार्फत, घेऊन चालतात, आणि ते लोक त्यामुळे आनंदित होतात; त्यांच्यावर एक वादळाचा झोका येतो आणि सगळीकडून त्यांच्यावर लाटा येऊन लागतात; आणि ते समजतात की, खूपच घेरलो गेलो[९]. (अशा वेळी) सर्व, केवळ शुद्ध भाव करूनअल्लाहचाच धांवा करतात[१०], की जर तू आम्हास, यापासून वाचवून घेशील तर आम्ही अवश्य तुझे उपकार मानणारे होऊन जाऊ (२२)

فَلَمَّآ أَنْجٰىهُمْ إِذَا هُمْ يَبْغُوْنَ فِي الْأَرْضِ بِغَيْرِ الْحَقِّ ۗ يٰٓأَيُّهَا النَّاسُ إِنَّمَا بَغْيُكُمْ عَلٰٓى أَنْفُسِكُمْ ۙ مَّتَاعَ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۖ ثُمَّ إِلَيْنَا مَرْجِعُكُمْ فَنُنَبِّئُكُمْ بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ﴿٢٣﴾

मग जेव्हा अल्लाहतआला त्यांना वांचवून घेतो, तर ते लगेचच जमिनीमध्ये नाहक शिरजोरी करू लागतात[११], अहो लोकांनो! ही तुमची शिरजोरी तुमच्यासाठी, तुमच्याच जीवावर बेतणार आहे[१२]. ऐहिक आयुष्यात सुखोपभोग घेत आहात, मग आमचेजवळ तुम्हास येणे आहे. मग आम्ही सर्व तुमचे केले सवरलेले तुम्हास दाखवून देऊ (२३)

१) म्हणजे हे शिर्क, लोकांची आपली निर्मिती आहे. नाहीतर पहिल्या प्रथम याचे काही अस्तित्व नव्हते. तमाम लोक एकाच धर्मावर आणि एकाच पंथावर होते. आणि तो इस्लाम आहे; ज्यात, एकेश्वरवादाचा आधारभूत पाया आहे. ह.नूह (عليه السلام) पर्यंत, लोक याच एकेश्वरवादावर कायम राहिलेत. मग त्यांच्यात मतभेद होऊन गेला. आणि काही लोकांनी, अल्लाहच्या बरोबर, दुसऱ्यांना पण उपास्य, इच्छापूर्ती करणारा, आणि संकट निवारक, समजणे सुरू करून दिले.

२) म्हणजे जर अल्लाहचा हा निर्णय न होता, की हुज्जत पूर्ण करण्यापूर्वी, कोणाला शिक्षा देत नसतो. त्याचप्रमाणे त्याने (आपल्या) निर्मितीसाठी एक ठराविक वेळ, निश्चित केला नसतां, तर तो नक्कीच त्यांच्या दरम्यान मतभेदांचा निर्णय आणि ईमानवाल्यांना पुण्यवान (भाग्यवान) आणि काफिरांना शिक्षा व त्रासांत व्यस्त केले असते.

३) याच्याने अभिप्रेत कोणी मोठा आणि स्पष्ट चमत्कार आहे. जसा समूदच्या लोकांसाठी उंटिणीचे प्रकटन झाले. त्यांच्या करता 'सफा डोंगराला' सोन्याचा किंवा मक्केच्या डोंगरांना साफ करून, त्यांच्या जागी पाण्याचे पाट, आणि बागा बनविण्याचा, किंवा या प्रकारचा कोणी चमत्कार सादर करून दाखविण्यात यावा.

४) म्हणजे जर अल्लाहतआला इच्छील तर त्यांच्या इच्छेप्रमाणे तो चमत्कार तर प्रकट करून दाखवू शकतो. परंतु याच्या नंतर सुद्धा, जर त्यांनी ईमान आणले नाही, तर अल्लाहचा कायदा हा आहे की, अशा लोकांना तो ताबडतोब नष्ट करून टाकतो. म्हणून या गोष्टीचे ज्ञान फक्त त्यालाच आहे की, कोण्या लोकांसाठी, त्यांच्या इच्छेप्रमाणे चमत्कार प्रकट करून देणे. त्यांच्यासाठी योग्य आहे किंवा नाही? आणि याचप्रमाणे या गोष्टीचे ज्ञानसुद्धा, फक्त

त्यालाच आहे की, त्यांचे वांछीत चमत्कार, जर त्यांना दाखविण्यांत आले नाहीत, तर त्यांना किती अवकाश दिला जाईल ? म्हणून पुढे सांगितले, ''तुम्ही पण वाट पहा, मी पण तुमच्या बरोबर, वाट पाहणाऱ्यांमधून आहे''.

५) संकटांनंतर देणग्यांचा अर्थ आहे, तंगी, दुष्काळ, संकटे आणि त्रासानंतर उपजिविकेची मुबलकता, जीवनावश्यक वस्तुंची स्वस्ताई वगैरे.

६) याचा अर्थ आहे की, ते आमच्या या देणग्यांची कदर आणि त्यावर अल्लाहचे आभार मानीत नाही, किंबहुना कुफ्र आणि शिर्क करतात, म्हणजे यांची ही वाईट वागणूक आहे जे ते अल्लाहच्या देणग्यांच्या प्रति अंगीकारतात.

७) म्हणजे अल्लाहची प्रयुक्ती, यापेक्षा किती तरी जास्त तिव्र आहे, जे ते अंगीकारतात. आणि ती ही आहे की, तो त्यांची (यावर) धरपकड करण्यांस समर्थ आहे. तो जेव्हा इच्छेल यांची धरपकड करू शकतो. लगेच आतां, किंवा त्याचे ज्ञान, विलंब करू इच्छित असेल, तर नंतरसुद्धा. 'मकरुन' अरबी भाषेत युक्ती आणि कर्म विषयक ज्ञानाला (बुध्दिमत्तेला) म्हणतात. जी चांगली पण असूंशकतात. आणि वाईट सुद्धा. येथे अल्लाहच्या पकडीला 'मकरुन' संबोधण्यात आले आहे.

८) ''युसय्येरुकुम'' तो तुम्हाला चालवितो किंवा चालणे फिरणे आणि सहल करण्याची सुबुद्धी देतो. 'जमिनीमध्ये' म्हणजे त्याने तुम्हाला पाय दिलेत, ज्याने तुम्ही चालतात. स्वाऱ्या दिल्या, ज्यावर तुम्ही स्वार होऊन लांबवरचे प्रवास करतात; 'आणि समुद्रांत' म्हणजे अल्लाहने तुम्हास नावा आणि जहाज बनविण्याचे ज्ञान आणि समज दिली; तुम्ही ती बनविली; आणि त्यांच्याने समुद्रातील प्रवास करतात.

९) 'उहिता बिहीम' चा अर्थ आहे, ज्या प्रकारे शत्रू कोण्या लोकांचा किंवा शहराचा घेराव करून घेतो, आणि मग ते शत्रुच्या दयेवर अवलंबून राहतात; अशाच प्रकारे जेव्हा खूप वादळाचे झोके आणि एकामागून एक येणाऱ्या मोठ्या लाटांनी, घेरले जातात; आणि मृत्यु त्यांच्या समोर नृत्य करतो.

१०) म्हणजे मग ते दुआंमध्ये, अल्लाहशिवाय इतरांची भेसळ करीत नाही; ज्याप्रमाणे ते सर्वसाधारण स्थितीत करीत असतात . सर्वसाधारण स्थितीत तर ते म्हणतात की, हे बुजुर्गपण अल्लाहचे पुण्यवान सेवक आहेत. त्यांनापण अल्लाहतआलाने अधिकार देऊन ठेवले आहेत. आणि त्यांच्याच मार्फत आम्ही अल्लाहची जवळीक शोधत असतो. परंतु जेव्हा अशाप्रकारे संकटात घेरले जातात, तर हे सारे शैतानी तत्वज्ञान विसरून जातात. आणि फक्त अल्लाहच आठवतो. आणि मग फक्त त्याचाच धांवा करतात. याच्याने एक गोष्ट तर ही ठाऊक झाली की, माणसाच्या प्रकृतीत, एका अल्लाहकडे वळण्याची भावना, उपजतच ठेवण्यांत आली आहे. मनुष्य वातावरणाने प्रभावित होऊन, भावना किंवा प्रकृतीला दाबून टाकतो, परंतु संकटांत ही भावना उफाळून येते; आणि ही प्रकृती परत फिरून येते. ज्याने ठाऊक झाले की, एकेश्वरवाद (तौहिद), मनुष्याच्या प्रकृतीचा आवाज, आणि मूळ गोष्ट आहे. ज्यापासून मनुष्याला विन्मुख व्हावयास नको. कारण की, यापासून तोंड फिरवणे, प्रकृतीपासून तोंड फिरवणे आहे. जे स्पष्ट मार्गभ्रष्ट होणे आहे. दुसरी गोष्ट ही ठाऊक झाली की, मुशरिकीन जेव्हा अशाप्रकारे, संकटांत घेरले जाता, तर ते आपल्या स्वनिर्मित उपास्यांच्या ऐवजी, फक्त एका अल्लाहचा धावा करीत असत. म्हणून ह.इकरमा ﵁ च्या बाबतीत येते की, जेव्हा मक्केवर विजय मिळाला, तर हे तेथून फरार होऊन गेलेत. बाहेर कुठे जाण्यासाठी नावेवर स्वार झाले. तेव्हा नांव वादळी वाऱ्यांच्या माऱ्यांत येऊन लागली. ज्यावर नावाड्याने नावेत बसलेल्या लोकांना म्हटले की, आज एका अल्लाहजवळ दुआ करा, तुम्हांस या वादळापासून, त्याच्यावाचून कोणी सुटका देणार नाही. ह.इकरमा ﵁ म्हणतात की, 'मी विचार केला की जर समुद्रात सुटका देणारा फक्त एक अल्लाह आहे, तर जमिनीत सुध्दा खचितच सुटका देणारा तोच आहे. आणि हीच गोष्ट मोहम्मद ﷺ म्हणतात. म्हणून त्यांनी निर्णय घेऊन टाकला, की जर येथून मी जिवंत वांचून निघून गेलो, तर मक्केला परत जाऊन, इस्लाम कबूल करून घेईन. त्याप्रमाणे हे नबी ﷺ च्या सेवेत उपस्थित झाले; आणि मुसलमान होऊन गेलेत. रजी. अल्लाहु अन्हु (सुनन निसाई, अबुदाऊद,) परंतु खेद आहे ! उम्मते मोहम्मदियाचे लोक अशा प्रकारे शिर्कमध्ये फसलेले आहेत की, संकटांत आणि अडचणींत सुध्दा ते अल्लाहकडे वळण्याच्या ऐवजी, मरण पावलेल्या बुजुर्गांनाच, संकटविमोचक समजतात. आणि मदतीसाठी त्यांचाच धांवा करतात. ''फइन्नालिल्लाहे व इन्ना इलैही व राजेऊन''

११) हा मनुष्याच्या याच कृतघ्नतेच्या सवयीचा उल्लेख आहे. ज्याची चर्चा आतांआ.१२ मध्ये सुद्धा येऊन चुकली. आणि कुरआनात आणखी सुद्धा अनेक ठिकाणी, अल्लाहने याचा उल्लेख केला आहे.

१२) अल्लाहतआलाने म्हटले, तुम्ही ही कृतघ्नता आणि दांडगाई करून घ्या. चार दिवसांचे हे क्षणभंगुर जीवनाचा फायदा उचलून, सरतेशेवटी तुम्हास आमच्याच जवळ येणे आहे. मग आम्ही तुम्हास, जे काही तुम्ही करत रहाल, ते दाखवून देऊं म्हणजे त्यांना शिक्षा देऊ.

اِنَّمَا مَثَلُ الْحَيٰوةِ الدُّنْيَا كَمَآءٍ اَنْزَلْنٰهُ مِنَ
السَّمَآءِ فَاخْتَلَطَ بِهٖ نَبَاتُ الْاَرْضِ مِمَّا يَاْكُلُ
النَّاسُ وَالْاَنْعَامُ ؕ حَتّٰۤى اِذَآ اَخَذَتِ الْاَرْضُ زُخْرُفَهَا
وَازَّيَّنَتْ وَظَنَّ اَهْلُهَآ اَنَّهُمْ قٰدِرُوْنَ عَلَيْهَآ ۙ اَتٰىهَآ
اَمْرُنَا لَيْلًا اَوْ نَهَارًا فَجَعَلْنٰهَا حَصِيْدًا كَاَنْ لَّمْ
تَغْنَ بِالْاَمْسِ ؕ كَذٰلِكَ نُفَصِّلُ الْاٰيٰتِ لِقَوْمٍ
يَّتَفَكَّرُوْنَ ﴿٢٤﴾

मग, या ऐहिक आयुष्याची स्थिति तर अशी आहे, जसे आम्ही आकाशांतून पाणी वर्षविलेमग त्याच्याने, जमिनीच्या वनस्पती, ज्यांना माणसे आणि चतुष्पाद खातात; खूप घनदाट होऊन निघाली. येथ पावेतो की, त्या जमिनीने आपला पूर्ण शृंगार धारण केला, व शुशोभित झाली; आणि त्यांच्या मालकांनी समजले की, आम्ही त्यावर सत्तावान झालो, तर दिवसात किंवा रात्रीत, त्यावर आमच्याकडून कोणी आज्ञा (आपत्ती) येऊन पडली, मग आम्ही त्याला असे नष्ट[१] करून टाकले, की जणू काल ते अस्तित्वातच नव्हते. आम्ही अशाच प्रकारे, आमच्या निशाण्यांना स्पष्टवर्णन करीत असतो, अशा लोकांसाठी जे मनन करतात. (२४)

وَاللّٰهُ يَدْعُوْٓا اِلٰى دَارِ السَّلٰمِ ؕ وَيَهْدِيْ مَنْ يَّشَآءُ اِلٰى
صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿٢٥﴾

आणि अल्लाहतआला सलामतीच्या घराकडे तुम्हास बोलवितो, आणि ज्याला इच्छितो, सरळ मार्गावर चालण्याची सुबुद्धी देतो (२५)

لِلَّذِيْنَ اَحْسَنُوا الْحُسْنٰى وَزِيَادَةٌ ؕ وَلَا يَرْهَقُ وُجُوْهَهُمْ
قَتَرٌ وَّلَا ذِلَّةٌ ؕ اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ الْجَنَّةِ ۚ هُمْ فِيْهَا
خٰلِدُوْنَ ﴿٢٦﴾

ज्या लोकांनी सुकृत्ये केली आहेत, त्याच्यासाठी भलाई आहे, आणि आणखी काही विशेषणपण[२]. आणि त्यांच्या तोंडावर काळीमाही पसरलेला नसेल व ना नामोशी; हे लोक स्वर्गांत राहणारे आहेत, ते त्यांत सदा सर्वदा राहतील (२६)

وَالَّذِيْنَ كَسَبُوا السَّيِّاٰتِ جَزَآءُ سَيِّئَةٍۭ بِمِثْلِهَا ۙ
وَتَرْهَقُهُمْ ذِلَّةٌ ؕ مَا لَهُمْ مِّنَ اللّٰهِ مِنْ عَاصِمٍ ۚ كَاَنَّمَآ
اُغْشِيَتْ وُجُوْهُهُمْ قِطَعًا مِّنَ الَّيْلِ مُظْلِمًا ؕ اُولٰٓئِكَ
اَصْحٰبُ النَّارِ ۚ هُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٢٧﴾

आणि ज्या लोकांनी वाईट कामे केलीत, त्यांच्या पापाची शिक्षा, त्यांच्याबरोबर मिळेल[३]. आणि त्यांच्यावर नामोशी आच्छादलेली असेल; त्यांना अल्लाहतआलाकडून कोणी वाचवूंशकणार नाही[४]. जणू त्यांच्या चेहऱ्यावर, अंधाऱ्या रात्रीचे तुकड्यावर तुकडे, आच्छादून देण्यात आले आहे[५]. हे लोक नरकाग्नीत राहणारे आहेत, ते त्याच्यात सदासर्वदा राहतील (२७)

وَيَوْمَ نَحْشُرُهُمْ جَمِيْعًا ثُمَّ نَقُوْلُ لِلَّذِيْنَ
اَشْرَكُوْا مَكَانَكُمْ اَنْتُمْ وَشُرَكَآؤُكُمْ ۚ فَزَيَّلْنَا بَيْنَهُمْ
وَقَالَ شُرَكَآؤُهُمْ مَّا كُنْتُمْ اِيَّانَا تَعْبُدُوْنَ ﴿٢٨﴾

आणि तो दिवसपण उल्लेख करण्या योग्य आहे, ज्या दिवशी आम्ही या सर्वांना एकत्र गोळा करू[६]; मग मुशरिकीनांना म्हणू की, तुम्ही आणि तुमचे सरकतदार, आपल्या जागेवर थांबा[७]. मग आम्ही त्यांच्या आपसात फुट घालून टाकू[८]; आणि त्यांचे ते सरकतदार म्हणतील की, तुम्ही आमची भक्ती करत नव्हते (२८)

فَكَفٰى بِاللّٰهِ شَهِيْدًاۢ بَيْنَنَا وَبَيْنَكُمْ اِنْ كُنَّا عَنْ
عِبَادَتِكُمْ لَغٰفِلِيْنَ ﴿٢٩﴾

तर आमच्या आणि तुमच्या दरम्यान, साक्षीदार म्हणून अल्लाह पुरेसा आहे, की आम्हास तुमच्या भक्तीची काही कल्पना सुद्धा नव्हती[९] (२९)

هُنَالِكَ تَبْلُوْا كُلُّ نَفْسٍ مَّآ اَسْلَفَتْ وَرُدُّوْٓا اِلَى
اللّٰهِ مَوْلٰىهُمُ الْحَقِّ وَضَلَّ عَنْهُمْ مَّا كَانُوْا يَفْتَرُوْنَ ﴿٣٠﴾ ع

النصف ٣ ع ١٠ ٨

या ठिकाणी प्रत्येक मनुष्य, आपल्या पूर्वी केलेल्या कामांना, अनुभवून घेईल[१०]. आणि हे लोक अल्लाहकडे, जो यांचा खरा मालक आहे, त्याच्याकडे परत आणले जातील; आणि जे काही खोटे त्यांनी घडवून ठेवले होते, ते सर्व त्यांच्यापासून नाहीसे होऊन जातील[११] (३०)

१) 'हसीदन' म्हणजे अशी शेती जिची कापणी करून एका बाजूस ठेऊन देण्यात आली असावी. आणि शेत साफ होऊन गेले असावे. ऐहिक जीवनाला अशाप्रकारे, शेतीची उपमा देऊन, याच्या तात्कालिक आणि कायम न राहण्याला स्पष्ट करून देण्यात आले आहे; की शेती सुद्धा पावसाच्या पाण्याने उत्कर्षा प्रत जाते; आणि हिरवीगार आणि प्रफुल्लीत होते; परंतु याच्यानंतर तिला कापून नष्ट करून टाकण्यांत येते.

२) या 'जियादतून' चे कित्येक भावार्थ सांगण्यांत आले आहेत. परंतु हदीसमध्ये याचे भाष्य, 'अल्लाहतआलाचे दर्शन' असे करण्यांत आले आहे. ज्यामुळे स्वर्गवाल्यांना स्वर्ग आणि स्वर्गातील देणग्या दिल्यानंतर, हे (दर्शन)

बहाल केले जाईल. (स.मुस्लीम,)
३) मागील महावाक्यात, स्वर्गवाल्यांची चर्चा होती. यांत सांगण्यांत आले होते की, त्यांना त्यांच्या सुकृत्यांचा मोबदला किती तरी पटींनी मिळेल, आणि या शिवाय आणखी अल्लाहच्या दर्शनाने उपकृत केले जातील. या महावाक्यांत सांगण्यांत येत आहे कुकृत्यांचा बदला कुकृत्यासारखाच मिळेल. 'सय्यआत' ने अभिप्रेत कुफ्र व शिर्क आणि दुसरे अपराध आहेत.
४) ज्याप्रमाणे की, ईमानवाल्यांना वाचविणारा अल्लाहतआला असेल; तो त्यांना या दिवशी, आपल्या खास कृपेने उपकृत करेन. याशिवाय त्यांच्याकरीता अल्लाहतआला आपल्या निवडक सेवकांना शिफारसची परवानगी पण देईन. ज्यांची शिफारस पण तो कबूल करेल.
५) ही अतिशयोक्ती आहे की, त्यांचे चेहरे इतके काळे ठिक्कर असतील. याच्या उलट ईमानवाल्यांचे चेहरे, प्रफुल्लीत तेजस्वी असतील; ज्याप्रमाणे सू.आले इमरान आ.१०६. सू.अबस आ.३८ ते ४१ आणि सू.कयामामध्ये आहे.
६) 'जमीअन्' ने अभिप्रेत आदीपासून शेवटपर्यंत, तमाम पृथ्वीवरची मनुष्ये आणि जिन्नात आहेत. सर्वांना अल्लाहतआला एकत्र गोळा करील. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आम्ही या सर्वांना एकत्र गोळा करू; कोणा एकाला पण सोडणार नाही.'' (सू. कहफ-४७)
७) यांच्या सामन्यांत, ईमानवाल्यांना दुसऱ्या बाजूला करून देण्यांत येईल; म्हणजे ईमानवाले आणि कुफ्रवाले व शिर्कवाले, दोघांना एक दुसऱ्यापासून वेगवेगळे करून देण्यांत येईल. जसे सांगितले, ''आणि हे गुन्हेगारांनो ! आज तुम्ही अलग होऊन जा.'' (सू.यासीन-५९) ''त्या दिवशी (लोक) गटात विभागले जातील'' (सू.रूम-४३) म्हणजे दोन गटात. लोक दोन गटात होऊन जातील. (इब्ने कसीर)
८) म्हणजे जगात यांच्यामध्ये, आपसात जो खास संबंध होता, तो संपवून टाकण्यांत येईल. आणि हे एक दुसऱ्याचे शत्रू बनून जातील. आणि त्यांचे उपास्य, या गोष्टीचाच इन्कार करतील की, हे लोक त्यांची भक्ती करीत होते. यांना मदतीसाठी बोलवित होते, यांच्या नांवावर नवस आणि चढावे देत असत.
९) हे नाकारण्याचे कारण आहे की, आम्हाला तर कांही ठाऊकच नाही, तुम्ही काय काय करीत होता. आणि जर आम्ही खोटे बोलत असू, तर आमच्या दरम्यान अल्लाहतआला साक्ष आहे; आणि तो पुरेसा आहे. याच्या साक्षीनंतर, कोण्या आणखी पुराव्याची आवश्यकताच राहत नाही. हे महावाक्य या गोष्टीवर पक्के खुले आहे की, मुशरिकीन ज्यांना मदतीसाठी बोलवित असत, त्या केवळ दगडाच्या मूर्त्या नव्हत्या (ज्या प्रमाणे आजकालचे कबरपुजक, आपल्या कबरीच्या उपासनेला, सिद्ध ठरविण्यासाठी म्हणतात की, या प्रकारची महावाक्ये तर मूर्तींसाठी आहेत.) किंबहुना ते ज्ञान आणि समज बाळगणाऱ्या व्यक्तीच असत; ज्यांच्या मृत्युनंतर लोक त्यांचे पुतळे आणि मूर्त्या बनवून, त्यांना पुजणे सुरू करून देत. ज्याप्रमाणे ह.नूह عليه السلام च्या लोकांच्या कर्माच्या ढंगावरून पण सिद्ध होते ज्याचा खुलासा स.बुखारी मध्ये आढळून येतो. दुसरे हे पण ठाऊक झाले की, मेल्यानंतर मनुष्य कितीही पुण्यवान असो, येथ पावेतो की नबी किंवा रसूल असो त्याला जगाच्या परिस्थितीचे ज्ञान नसते. त्याचे अनुकरण करणारे आणि श्रद्धाळू त्याला मदतीकरता बोलवितात; त्याच्या नांवाचा नवस करतात. त्याच्या कबरीवर मेळ्यांची व्यवस्था करतात; परंतु त्याला काहीच ठाऊक नसते; आणि या सर्व गोष्टीचा इन्कार, असे लोक कयामतच्या दिवशी करतील. हीच गोष्ट सू.अहकाफ महावाक्य ५/६ मध्ये,पण सांगण्यांत आली आहे.
१०) म्हणजे जाणून घेईन किंवा गोडी चाखून घेईन.
११) म्हणजे कोणी उपास्य आणि 'संकट निवारक' तेथे कामास येणार नाही. कोणी कोणाच्या संकट निवारण्यास समर्थ राहणार नाही.

قُلْ مَنْ يَرْزُقُكُمْ مِنَ السَّمَاءِ وَالْأَرْضِ أَمَّنْ يَمْلِكُ السَّمْعَ وَالْأَبْصَارَ وَمَنْ يُخْرِجُ الْحَيَّ مِنَ الْمَيِّتِ وَيُخْرِجُ الْمَيِّتَ مِنَ الْحَيِّ وَمَنْ يُدَبِّرُ الْأَمْرَ ۚ فَسَيَقُولُونَ اللَّهُ ۚ فَقُلْ أَفَلَا تَتَّقُونَ ﴿٣١﴾

आपण विचारा की, तो कोण आहे, जो तुम्हाला आकाश आणि पृथ्वीतून रोजी पोहचवितो; किंवा तो कोण आहे, जो कान आणि डोळ्यांवर पूर्ण अधिकार बाळगतो; आणि तो कोण आहे जो जिवंतास मेलेल्यांतून काढतो आणि मेलेल्यांस जिवंतातून काढतो. आणि तो कोण आहे, जो सर्व कामांची व्यवस्था लावतो? अवश्य ते हेच बोलू लागतील की, ''अल्लाह[१]!'' तर मग त्यांना सांगा की, मग तुम्ही का त्याला भीत नाही? (३१)

فَذَٰلِكُمُ اللَّهُ رَبُّكُمُ الْحَقُّ ۖ فَمَاذَا بَعْدَ الْحَقِّ إِلَّا الضَّلَالُ ۖ فَأَنَّىٰ تُصْرَفُونَ ﴿٣٢﴾

तर हा आहे अल्लाहतआला, जो तुमचा खराखरा पालनकर्ता आहे; तर सत्यानंतर, मार्गभ्रष्टतेशिवाय आणखी काय राहून गेले? मग कोठे पालटले जातात[२]? (३२)

كَذَٰلِكَ حَقَّتْ كَلِمَتُ رَبِّكَ عَلَى الَّذِينَ فَسَقُوا أَنَّهُمْ لَا يُؤْمِنُونَ ﴿٣٣﴾

अशाच प्रकारे तुमच्या पालनकर्त्याची ही गोष्ट, की हे ईमान आणणार नाहीत, तमाम आज्ञाभंजक लोकांच्या बाबतीत खरी होऊन चुकली आहे[३]. (३३)

قُلْ هَلْ مِنْ شُرَكَائِكُمْ مَنْ يَبْدَأُ الْخَلْقَ ثُمَّ يُعِيدُهُ ۚ قُلِ اللَّهُ يَبْدَأُ الْخَلْقَ ثُمَّ يُعِيدُهُ ۖ فَأَنَّىٰ تُؤْفَكُونَ ﴿٣٤﴾

आपण असे विचारा की, काय तुमच्या सरकतदारात कोणी असा आहे, जो पहिल्या वेळेस पण निर्माण करेल, मग तो दुसऱ्यादा पण निर्माण करेल? आपण सांगून टाका की, अल्लाहच पहिल्यावेळी निर्माण करतो; मग तोच दुसऱ्यादा पण निर्माण करील, मग तुम्ही कोठे पालटले जातात[४]? (३४)

قُلْ هَلْ مِنْ شُرَكَائِكُمْ مَنْ يَهْدِي إِلَى الْحَقِّ ۚ قُلِ اللَّهُ يَهْدِي لِلْحَقِّ ۗ أَفَمَنْ يَهْدِي إِلَى الْحَقِّ أَحَقُّ أَنْ يُتَّبَعَ أَمَّنْ لَا يَهِدِّي إِلَّا أَنْ يُهْدَىٰ ۖ فَمَا لَكُمْ كَيْفَ تَحْكُمُونَ ﴿٣٥﴾

आपण विचारा की, आपल्या सरकतदारात कोणी असा आहे की, जो सत्याचा मार्ग दाखवीत असेल? आपण सांगून टाका की, अल्लाहच सत्याचा मार्ग दाखवितो[५]. तर मग काय जो मनुष्य, सत्याचा मार्ग दाखवीत असेल, तो जास्त आज्ञापालनाच्या लायक आहे, किंवा तो मनुष्य, ज्याला दाखविल्याशिवाय, स्वत:हाच मार्ग सूचणार नाही[६]. मग तुम्हास काय होऊन गेले आहे? तुम्ही कसे निर्णय घेतात[७]? (३५)

وَمَا يَتَّبِعُ أَكْثَرُهُمْ إِلَّا ظَنًّا ۚ إِنَّ الظَّنَّ لَا يُغْنِي مِنَ الْحَقِّ شَيْئًا ۚ إِنَّ اللَّهَ عَلِيمٌ بِمَا يَفْعَلُونَ ﴿٣٦﴾

आणि यांच्यातून बहुतेक लोक फक्त केवळ अनुमानावरच चालतात. खचितच् अनुमान, सत्याच्या बाबत जरा पण फायदेकारक नाही[८]. हे जे काही करीत आहेत; खचितच् अल्लाहला सर्व काही ठाऊक आहे[९]. (३६)

وَمَا كَانَ هَٰذَا الْقُرْآنُ أَنْ يُفْتَرَىٰ مِنْ دُونِ اللَّهِ وَلَٰكِنْ تَصْدِيقَ الَّذِي بَيْنَ يَدَيْهِ وَتَفْصِيلَ الْكِتَابِ لَا رَيْبَ فِيهِ مِنْ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿٣٧﴾

आणि हे कुरआन, असे नाही, की, अल्लाहशिवाय रचून घेतले असावे. किंबहुना हे तर (मागील) पुस्तकांना खरे ठरवाणारे आहे, जी याच्यापूर्वी (अवतरीत) होऊन चुकली आहेत[१०]. आणि (आवश्यक आदेशांचा) तपशील वर्णन करणारे आहे[११]. यात कुठलीही गोष्ट शंकास्पद[१२] नाही, हे सकल जगांच्या पालनकर्त्याकडून आहे[१३]. (३७)

أَمْ يَقُولُونَ افْتَرَاهُ ۖ قُلْ فَأْتُوا بِسُورَةٍ مِثْلِهِ وَادْعُوا مَنِ اسْتَطَعْتُمْ مِنْ دُونِ اللَّهِ إِنْ كُنْتُمْ صَادِقِينَ ﴿٣٨﴾

काय हे लोक असे म्हणतात की, तुम्ही याला स्वत: रचून घेतले आहे? आपण सांगून टाका की, मग तुम्ही याच्या सारखा एकच अध्याय आणा; आणि अल्लाहशिवाय तुम्ही ज्या ज्या इतरांना बोलवू शकतात, त्यांना बोलवून घ्या; जर तुम्ही खरे आहात[१४] (३८)

१) या महावाक्याने सुद्धा स्पष्ट आहे की, मुशरिकीन अल्लाहतआलाच्या मालक होण्याला, निर्माता होण्याला, पालनकर्ता होण्याला, आणि त्याला कार्यसाधक होण्याला मान्य करीत होते; परंतु असे असून सुद्धा, कारण की त्याच्या उपास्यत्वांत दुसऱ्यांना सरकतदार ठरवित असत. म्हणून अल्लाहतआलाने त्यांना नरकाग्नीचे इंधन ठरविले. आजकालचे ईमानचा दावा करणारे सुद्धा, उपास्यत्वाच्या एकेश्वरवादाला न मानणारे आहेत.

२) म्हणजे पालनकर्ता आणि उपास्य तर हाच आहे. ज्याच्या बाबतीत तुम्हा स्वत:स मान्य आहे की, प्रत्येक वस्तुचा निर्माता

आणि मालक, आणि व्यवस्थापक तोच आहे. मग त्या उपास्याला सोडून, जे तुम्ही दुसरे उपास्य बनवून फिरतात, ते मार्गभ्रष्टतेशिवाय, आणखी काय आहे? तुमच्या लक्षात ही गोष्ट का येत नाही? तुम्ही कोठे पालटले जातात?

३) म्हणजे ज्याप्रमाणे हे मुशरिकीन, सर्व गोष्टी मान्य केल्यावर सुद्धा, 'शिर्क' वर कायम आहेत; आणि त्याला सोडावयास तयार नाही, याचप्रमाणे तुझ्या पालनकर्त्याची ही गोष्ट, सिद्ध होऊन गेली की, हे ईमान आणणार नाहीत. कारण की, हे चुकीचा मार्ग सोडून, सत्त्याचा मार्ग अंगीकारण्याला, तयारच नाही. तर मार्गदर्शन आणि ईमान त्यांना कशाप्रकारे मिळू शकते? ही तीच गोष्ट आहे, जिला दुसऱ्या ठिकाणी अशाप्रकारे सांगण्यांत आली आहे; ''परंतु शिक्षेची गोष्ट काफिरांवर सिद्ध होऊन गेली.'' (सू.जुमर - ७१)

४) मुशरिकीनच्या शिर्कच्या पोकळपणाला स्पष्ट करून देण्याकरीता त्यांना विचारण्यांत येत आहे की, सांगा, ज्यांना तुम्ही अल्लाहचे सरकतदार ठरवितात, काय त्यांनी या विश्वाला पहिल्या वेळी निर्माण केले आहे? किंवा दुसऱ्यांदा त्याला निर्माण करण्याला समर्थ आहेत? नाही! खचित्च नाही!! पहिल्या वेळी सुद्धा निर्माण करणारा अल्लाहच आहे. आणि कयामतच्या दिवशी दुसऱ्यांदा तोच सर्वांना जिवंत करेल. तर मग तुम्ही हिदायतचा मार्ग सोडून, कुठे पालटले जात आहात?

५) म्हणजे भटकून गेलेल्या मार्गाच्या प्रवाशांना मार्ग दाखविणारा, आणि अंत:करणाला मार्गभ्रष्टतेकडून, हिदायतकडे फिरवणारापण, अल्लाहतआलाच आहे. यांच्या सरकतदारांमधून कोणी असा नाही, जो हे काम करू शकेल.

६) म्हणजे मग अनुकरण करण्याच्या योग्यतेचा कोण आहे? तो मनुष्य जो पाहणारा, ऐकणारा, आणि लोकांना सत्त्याकडे मार्गदर्शन करतो? किंवा जो आंधळा आणि बहिरा असल्या कारणाने, स्वत: रस्त्यावर चालूंपण शकत नाही, जो पर्यंत की, दुसरे लोक त्याला रस्त्याला लावून देत नाही. किंवा हात धरून घेऊन जाणार नाही.

७) म्हणजे तुमच्या अक्लेला काय होऊन गेले आहे? तुम्ही कशाप्रकारे अल्लाहला आणि त्याच्या निर्मितीला, बरोबर ठरवीत आहात? आणि अल्लाह बरोबर दुसऱ्यांना पण भक्तीत शामील करत आहात? जेव्हा या प्रमाणांचा तगादा हा आहे की, फक्त त्याच एका अल्लाहला उपास्य मानले जावे; आणि उपासनेचे सर्व प्रकार, फक्त त्याच्याचसाठी, निव्वळ मानले जावेत.

८) परंतु गोष्ट अशी आहे की, लोक निव्वळ अटकळपंचु गोष्टीवर चालणारे आहेत. वास्तविक त्यांना ठाऊक आहे की, प्रमाणांच्या तुलनेत, कल्पना आणि गुमान करण्याची काही किंमत नाही. कुरआनांत जन, विश्वास आणि अनुमान (गुमान) दोन्ही अर्थांत वापरण्यांत आला आहे. या ठिकाणी दुसरा अर्थ (म्हणजे गुमान) अभिप्रेत आहे.

९) म्हणजे या हटधर्माची (दुराग्रह) तो शिक्षा देईन की, प्रमाणे नसून सुद्धां, हे निव्वळ निरर्थक कल्पना आणि चुकीच्या वेडगळ कल्पनांच्या मागे लागून राहिले. आणि अक्कलेने आणि समजाने जरापण काम न केले.

१०) जे या गोष्टीचे प्रमाण आहे की, हे कुरआन रचलेले नाही. परंतु त्याच व्यक्ती विशेषाकडून प्रकट झाले आहे, ज्याने मागील पुस्तके प्रकट केली होती.

११) म्हणजे हलाल व हराम, आणि योग्य आणि अयोग्य यांचा तपशील सांगणारा.

१२)याच्या शिकवणीत, याने वर्णन केलेल्या गोष्टी आणि घटनांमध्ये आणि भविष्यांत पुढे येणाऱ्या घटनांच्या बाबतीत.

१३) या सर्व गोष्टी स्पष्ट करतात की, सकल जगांच्या पालनकर्त्याकडूनच अवतरीत झाले आहे. जो 'भूतकाळ आणी भतविष्यकाळाचा जाणणारा आहे.

१४) या सर्व सत्त्यता आणि प्रमाणानंतर, जर तुमचा दावा हाच आहे की, हे कुरआन, मोहम्मद ﷺ चे रचित आहे; तर तो पण तुमच्याच सारखा एक मनुष्य आहे. तुमची भाषापण, त्याच्याप्रमाणे अरबी आहे. तो तर एकटाच आहे; जर तुम्ही आपल्या दाव्यांत खरे आहांत, तर तुम्ही दुनियाभरच्या माणसांना, विद्वान आणि साहित्यीकांना आणि ज्ञानी व लिहिणाऱ्यांना, एकत्र गोळा करून घ्या; आणि या कुरआनाच्या लहानांत लहान अध्यायासारखा (अध्याय) बनवून सादर करा. कुरआन करीमचे हे 'चॅलेंज' आजपर्यंत उत्तराच्या प्रतिक्षेत आहे. ज्याचा साफ अर्थ हा आहे की, हे कुरआन, कोण्या माणसाच्या प्रयत्नांचा परिणाम नाही, किंबहुना खरोखर, ईशवाणी आहे, जी हजरत मोहम्मद रसूलुल्लाहु ﷺ वर अवतीर्ण झाली आहे.

بَلْ كَذَّبُوا بِمَا لَمْ يُحِيطُوا بِعِلْمِهِ وَلَمَّا يَأْتِهِمْ تَأْوِيلُهُ ۚ كَذَٰلِكَ كَذَّبَ الَّذِينَ مِنْ قَبْلِهِمْ ۖ فَانْظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الظَّالِمِينَ ﴿٣٩﴾

**परंतु अशा गोष्टीला नाकारू लागले, ज्याला आपल्या ज्ञानाच्या पोहचप्रत आणले नाही[१]. आणि अजून त्याचा शेवटचा परिणाम त्याच्या प्रत्ययास आला नाही[२], जे लोक याच्यापूर्वी होऊन गेले आहेत, अशाच प्रकारे त्यांनी पण मिथ्यारोप केला. तर पाहून घ्या, त्या जालिमांचा कसा परिणाम झाला[३] ? (३९)**

وَمِنْهُمْ مَنْ يُؤْمِنُ بِهِ وَمِنْهُمْ مَنْ لَا يُؤْمِنُ بِهِ ۚ وَرَبُّكَ أَعْلَمُ بِالْمُفْسِدِينَ ﴿٤٠﴾

**आणि त्यांच्यातून काही असे आहेत, जे यावर ईमान घेऊन येतील, आणि काही असे आहेत, जे ईमान आणणार नाहीत. आणि तुमचा पालनकर्ता फिसाद खोरांना खूप जाणून आहे[४]. (४०)**

وَإِنْ كَذَّبُوكَ فَقُلْ لِي عَمَلِي وَلَكُمْ عَمَلُكُمْ ۖ أَنْتُمْ بَرِيئُونَ مِمَّا أَعْمَلُ وَأَنَا بَرِيءٌ مِمَّا تَعْمَلُونَ ﴿٤١﴾

**आणि जर तुम्हांस खोटेच म्हणत राहतील, तर असे सांगून द्या की, माझे केले सवरले मला मिळेल आणि तुमचे केले सवरले तुम्हास मिळेल. तुम्ही माझ्या कृत्याला उत्तरदायी नाहीत आणि मी तुमच्या केलेल्याला, उत्तरदायी नाही[५]. (४१)**

وَمِنْهُمْ مَنْ يَسْتَمِعُونَ إِلَيْكَ ۚ أَفَأَنْتَ تُسْمِعُ الصُّمَّ وَلَوْ كَانُوا لَا يَعْقِلُونَ ﴿٤٢﴾

**आणि यांच्यातून काही असे आहेत, जे तुमच्याकडे कान लाऊन बसतात. काय आपण बहिऱ्यांना ऐकवू शकाल? जरी ते अक्कल ठेवीत नसतील[६] (४२)**

وَمِنْهُمْ مَنْ يَنْظُرُ إِلَيْكَ ۚ أَفَأَنْتَ تَهْدِي الْعُمْيَ وَلَوْ كَانُوا لَا يُبْصِرُونَ ﴿٤٣﴾

**आणि त्यांच्यातून काही असे आहेत, की आपणास पहात आहेत, तर काय आपण आंधळ्यांना रस्ता दाखवू इच्छितात? जरी त्यांना काहीच दिसत नसेल[७] ? (४३)**

إِنَّ اللَّهَ لَا يَظْلِمُ النَّاسَ شَيْئًا وَلَٰكِنَّ النَّاسَ أَنْفُسَهُمْ يَظْلِمُونَ ﴿٤٤﴾

**ही नक्की गोष्ट आहे की, अल्लाह लोकांवर काही जुलूम करीत नाही; परंतु लोक स्वत:च आपणच आपल्या जिवावर जुलूम करून घेतात[८] (४४)**

وَيَوْمَ يَحْشُرُهُمْ كَأَنْ لَمْ يَلْبَثُوا إِلَّا سَاعَةً مِنَ النَّهَارِ يَتَعَارَفُونَ بَيْنَهُمْ ۚ قَدْ خَسِرَ الَّذِينَ كَذَّبُوا بِلِقَاءِ اللَّهِ وَمَا كَانُوا مُهْتَدِينَ ﴿٤٥﴾

**आणि त्यांना तो दिवस आठवून द्या, ज्यात अल्लाह त्यांना (या स्थितीत) जमा करील, की जणू ते, सर्व दिवसाची एक अर्धी घटका, (जगात) राहिले असतील[९]. आणि आपसांत एक दुसऱ्याला ओळखतील[१०]. खरोखर तोट्यात पडले ते लोक, ज्यांनी अल्लाहच्याजवळ जाण्यास खोटे ठरविले. आणि ते हिदायत मिळविणारे नव्हते. (४५)**

وَإِمَّا نُرِيَنَّكَ بَعْضَ الَّذِي نَعِدُهُمْ أَوْ نَتَوَفَّيَنَّكَ فَإِلَيْنَا مَرْجِعُهُمْ ثُمَّ اللَّهُ شَهِيدٌ عَلَىٰ مَا يَفْعَلُونَ ﴿٤٦﴾

**आणि ज्याचा आम्ही त्यांच्याशी वायदा करीत आहोत, त्यांतून थोडेसे तर आम्ही आपणास दाखवून देऊ, किंवा याच्यापूर्वीच आम्ही आपणास मृत्युच देऊ. तर यांना आमच्याजवळ येणे तर आहेच. मग अल्लाह त्यांच्या सर्व कर्मांवर शाक्षी आहे. [११] (४६)**

१) म्हणजे कुरआनावर चिंतन आणि त्याच्या अर्थावर मनन केल्याशिवाय, त्याला खोटे ठरविण्यावर अडून गेलेत.

२) म्हणजे कुरआनाने ज्या मागील घटना, आणि भविष्यांतल्या शक्यता, वर्णन केल्या आहेत, याचे पूर्ण सत्त्यत्व आणि वास्तव्यत्व सुद्धा,त्यांच्यावर स्पष्ट झाले नाही; याच्याशिवाय, त्याला खोटे ठरविणे सुरू करून दिले; किंवा दुसरा भावार्थ हा आहे की, त्यांनी निरपेक्ष वृत्तीने चिंतन केल्याशिवाय, त्याला खोटे ठरवून टाकले. वास्तविक जर ते खऱ्या अर्थाने यावर चिंतन करते, आणि त्याच्या आदेशांवर मनन करते. जी याच्या ईशवाणी होण्यावर प्रमाणित आहेत. तर खचित्च त्याच्या समज आणि अर्थाचे, दरवाजे त्यांच्यावर उघडून गेले असते. या स्वरूपांत त्याच्या सांगण्याचा (तावील) अर्थ, कुरआन करीमचे, भेद आणि ओळख, आणि सुक्ष्मभेद व भावार्थ, यांचे स्पष्ट होण्याचे होतील.

३) ही त्या काफिर आणि मुशरिकांना तंबी आणि चेतावणी आहे, की तुमच्या सारखेच मागील लोकसमूहांनी सुद्धा, अल्लाहच्या निशाण्यांना खोटे ठरविले, तर पहा की, त्यांचा काय परिणाम झाला? जर तुम्ही या खोटे ठरविण्यापासून

परावृत्त झाले नाहीत, तर तुमचा परिणाम सुद्धा, याहून वेगळा होणार नाही.
४) तो खूप चांगल्याप्रकारे जाणतो की, हिदायतला कोण पात्र आहे? मग त्याला मार्गदर्शन करतो आणि मार्गभ्रष्टता करणारा कोण आहे. तर त्याच्या करता मार्गभ्रष्टतेचा मार्ग, उघडून देतो. तो न्यायी आहे. त्याच्या कोण्या कामात जुलूमाचा गंध सुद्धा नाही. जो ज्या गोष्टीला पात्र असतो, त्याप्रमाणे तो ती गोष्ट त्याला देऊन टाकतो.
५) म्हणजे सर्व समजाविणे आणि प्रमाणे दिल्यानंतर सुद्धा, जर ते खोटे ठरविण्यापासून परावृत्त होणार नाहीत, तर आपण असे सांगून टाका की, माझे काम फक्त आवाहन आणि प्रचार आहे; तर ते मी करून चुकलो आहे. आता न तुम्ही माझ्या कर्माला जबाबदार आहात, न मी तुमच्या कर्माला. सर्वांना अल्लाहच्या दरबारांत हजर होणे आहे. तेथे प्रत्येक माणसाकडून त्याच्या चांगल्या किंवा वाईट कर्माची विचारपूस होणार आहे. ही तीच गोष्ट आहे, ''कुल् या अय्योहल काफीरूना, ला अअ्बुदू मातअबुदून'' मध्ये,आहे, आणि ह.इब्राहीम عليه السلام ने या शब्दांत सांगितली होती, ''नि:संशय, आम्ही तुमच्या कडून या सर्वांपासून अलिप्त आहोत. आणि ज्यांची तुम्ही अल्लाहच्या शिवाय भक्ती करता, आम्ही तुम्हाला (श्रध्देला) नाकारत आहोत.'' (अल मुम्तहना - ४)
६) म्हणजे जाहीर रित्या ते कुरआनाला तर ऐकत असतात; परंतु ऐकण्याचा उद्देश्य, कारण की, हिदायत मिळविण्याची इच्छा नाही, म्हणून त्यांना, अशाच प्रकारे, काही फायदा होत नाही; ज्याप्रमाणे एका बहिऱ्याला, काही फायदा होत नाही. विशेषत: जेव्हा बहिरा अक्कल बाळगित नसेल. कारण की बुद्धीमान बहिरा, तर इशाऱ्यांनी काही समजून घेतो, परंतु यांचे उदाहरण तर अक्कल नसलेल्या बहिऱ्या सारखी आहे जो बिलकुल वंचित् राहतो.
७) अशाच प्रकारे काही लोक आपणाकडे पहातात. परंतु उद्देश्य त्यांचा आणखी काही पण असतो; म्हणून त्यांना पण अशाप्रकारे काही फायदा होत नाही; ज्याप्रमाणे एका आंधळ्याला होत नाही. विशेषत: तो आंधळा मनाच्या दृष्टीने पण वंचित असेल. कारण काही आंधळे, ज्यांना अंतरदृष्टी असते तो डोळ्यांच्या दृष्टीने वंचित असून सुद्धा, पुष्कळ काही समजून घेतो. परंतु त्यांचे उदाहरण असेच आहे, जसा कोणी आंधळा असावा, जो अंतर्दृष्टीने वंचित असावा. उद्देश्य या गोष्टींनी नबी ﷺ चे सांत्वन करणे आहे. ज्याप्रमाणे एका बुद्धीमान वैद्याला ठाऊक होऊन जाईल की आजारी माणूस, इलाज करवून घेण्यात गंभीर नाही; आणि तो माझ्या सूचनांची आणि उपायांची पर्वा करीत नाही, तर तो त्याला नजरेआड करून देतो; आणि त्यावर आपला वेळ खर्च करणे पंसत करीत नाही.
८) म्हणजे अल्लाहतआलाने तर त्यांना सर्व नैपुण्ये बहाल केली आहेत. डोळे पण दिले, ज्यांनी पाहूंशकतात. कान दिले आहेत, ज्याने ऐकू शकतात. बुद्धी आणि अंतर्ज्ञान दिले आहे, ज्याने सत्त्य आणि असत्य, आणि खोटे आणि खरे यांच्या दरम्यान भेद करू शकतात. परंतु जर या नैपुण्याचा योग्य उपयोग करून, ते सत्याचा मार्ग चोखळत नाही तर मग हे स्वत: च आपणावर जुलूम करीत आहेत. अल्लाहतआलाने तर त्यांच्यावर कुठलाही जुलूम केलेला नाही.
९) म्हणजे कयामतच्या दिवसाचे काठिण्य पाहून ते जगाच्या सर्व मजा विसरून जातील; आणि ऐहिक जीवन त्यांना असे वाटेल, जणू ते जगात, एकाध घटकाच राहिले आहेत.
१०) कयामतच्या दिवशी वेगवेगळ्या अवस्था (स्थिती) असतील. ज्यांना कुरआनांत वेगवेगळ्या ठिकाणी वर्णन करण्यांत आले आहे. एक वेळ असा पण असेल, जेव्हा एक दुसऱ्याला ओळखतील. काही प्रसंग असे येतील की ज्यात, एक दुसऱ्यावर मार्ग भ्रष्टतेचा आरोप करतील; आणि काही प्रसंगी अशी भीती वाटेल की, ''आपसात न एक दुसऱ्याच्या नाते संबंधाचा पत्ता असेल, न एक दुसऱ्याला विचारतील.'' (सू.मोमेनून - १०१)
११) या महावाक्यात अल्लाहतआला फर्मावित आहे, की आम्ही या काफिरांच्या बाबतीत जो वायदा करीत आहोत, की जर ते कुफ्र आणि शिर्कवर अडूनच राहिले, तर त्यांच्यावर सुद्धा अशाचप्रकारे अल्लाहची शिक्षा येऊ शकते, ज्या प्रमाणे मागील लोकसमूहांवर आली. याच्यातून काही जर आम्ही आपल्या जीवनांत पाठवून देऊ, तर हे पण शक्य आहे की, आपण समाधान पावाल. परंतु जर आपण याच्यापूर्वीच, जगातून उचलून घेतले गेले, तरी काही हरकत नाही, या काफिरांना सरशेवटी आमच्याचजवळ येणे आहे. यांची सर्व कर्मे आणि परिस्थिती यांची आम्हाला माहिती आहे. तेथे ते आमच्या शिक्षेकडून कोण्याही प्रकारे वाचू शकत नाही. म्हणजे जगात तर आमच्या विशिष्ट प्रयोजनामुळे शक्य आहे की, (ते) शिक्षेपासून वाचून जातील; परंतु परलोकांत तर त्यांच्यासाठी, आमच्या शिक्षेपासून वांचणे शक्यच होणार नाही; कारण की कयामत घडण्याचा तर उद्देश्य हाच आहे की, तेथे आज्ञाधारकांना, त्यांच्या आज्ञापालनाचा बदला, आणि आज्ञाभंजकांना त्यांच्या आज्ञांभंजनाची शिक्षा दिली जावी.

| | |
|---|---|
| **आणि प्रत्येक समूहासाठी एक आदेश पोहचवणारा आहे. मग जेव्हा त्यांचा तो पैगंबर येऊन चुकतो, त्यांचा फैसला, न्यायाने केला जातो[१]; आणि त्यांच्यावर जुलूम केला जात नाही.** (४७) | وَلِكُلِّ أُمَّةٍ رَّسُولٌ ۖ فَإِذَا جَاءَ رَسُولُهُمْ قُضِيَ بَيْنَهُم بِالْقِسْطِ وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ﴿٤٧﴾ |
| **आणि हे लोक म्हणतात की, हा वायदा केव्हा पूर्ण होईल जर तुम्ही खरे आहात** (४८) | وَيَقُولُونَ مَتَىٰ هَٰذَا الْوَعْدُ إِن كُنتُمْ صَادِقِينَ ﴿٤٨﴾ |
| **आपण सांगून टाका की मी माझ्या स्वत: करतांतर कोण्या नफा किंवा नुकसानीचा अधिकार बाळगतच नाही, परंतु जेवढे अल्लाहला मंजूर असेल, प्रत्येक समूहासाठी एक वेळ निश्चित आहे; मग जेव्हा त्यांचा तो निश्चित वेळ येऊन पोहचतो, तर एक घटका न मागे सरकूं शकतात, आणि न पुढे सरकू शकतात[२].** (४९) | قُل لَّا أَمْلِكُ لِنَفْسِي ضَرًّا وَلَا نَفْعًا إِلَّا مَا شَاءَ اللَّهُ ۗ لِكُلِّ أُمَّةٍ أَجَلٌ ۚ إِذَا جَاءَ أَجَلُهُمْ فَلَا يَسْتَأْخِرُونَ سَاعَةً ۖ وَلَا يَسْتَقْدِمُونَ ﴿٤٩﴾ |
| **आपण (यांना) सांगा की हे तर दाखवा, जर तुमच्यावर अल्लाहची शिक्षा रात्री येऊन पडेल किंवा दिवसांत, तर शिक्षेमध्ये कोणती गोष्ट अशी आहे की, अपराधी लोक, तिच्याकरता घाई करीत आहे[३].** (५०) | قُلْ أَرَأَيْتُمْ إِنْ أَتَاكُمْ عَذَابُهُ بَيَاتًا أَوْ نَهَارًا مَّاذَا يَسْتَعْجِلُ مِنْهُ الْمُجْرِمُونَ ﴿٥٠﴾ |

१) याचा एक अर्थ तर हा आहे की, प्रत्येक लोकसमूहांत आम्ही पैगंबर पाठवित राहिलो. आणि मग जेव्हा पैगंबर, आपले प्रचाराचे कर्तव्य, पूर्ण करून चुकतो; तर मग यांच्या दरम्यान न्यायपूर्ण रीतीने (आम्ही) फैसला करून टाकतो. म्हणजे पैगंबर आणि त्याच्यावर ईमान आणणारे, यांना आम्ही वांचवून घेतो; आणि दुसऱ्यांना नष्ट करून टाकतो. कारण की, ''आणि आमची सवय नाही की, पैगंबर पाठविण्यापूर्वीच, शिक्षा करू लागावे.'' (सू.बनी इस्राईल-१७) आणि या फैसल्यांत त्यांच्यावर काही जुलूम होत नसे. कारण की, जुलूम तर तेव्हा झाला असता, जेव्हा गुन्ह्याशिवाय त्यांच्यावर शिक्षा पाठवून दिली असती. किंवा संपूर्ण तर्कपूर्ण केल्याशिवाय, त्यांची पकड झाली असती. (फत्हुल कदीर) दुसरा भावार्थ याचा हा सांगण्यांत आला आहे की, याचा संबंध कयामतशी आहे. म्हणजे कयामतच्या दिवशी, जेव्हा प्रत्येक लोकसमूह, जेव्हा अल्लाहच्या समक्ष उभा केला जाईल, तर त्या लोक समूहात पाठविलेला पैगंबर पण, त्याच्याबरोबर असेल. सर्वांची कर्मपत्रे पण असतील, आणि देवदूत सुद्धा, साक्षीदार म्हणून, हजर केले जातील. आणि अशाप्रकारे प्रत्येक लोकसमूह आणि त्याच्या पैगंबरा दरम्यान, न्यायपूर्ण रितीने फैसला केला जाईल. आणि हदीसमध्ये येते की, उम्मते मुहम्मदियाचा फैसला, सर्वांत प्रथम केला जाईल. जसे की सांगितले, ''आम्ही जरी, सर्वांच्या नंतर येणारे आहोत, परंतु कयामतच्या दिवशी सर्वांत पुढे राहूं. आणि सर्व निर्मितीच्या आधी, आमचा फैसला केला जाईल.'' (स.मुस्लीम)

२) हे मुशरिकीनच्या, अल्लाहची शिक्षा मागण्यावर, सांगण्यांत येत आहे की, मी तर आपल्या जिवासाठी सुद्धा, नफा नुकसानीचा अधिकार बाळगत नाही; तर मग मी कोण्या दुसऱ्याला नुकसान किंवा नफा कसा पोहचवू शकेल? हां! सर्व अधिकार अल्लाहच्या हातांत आहे. आणि तो आपल्या मर्जीनुसारच कोणाला नफा किंवा नुकसान पोहचविण्याचा फैसला करतो. याशिवाय अल्लाहतआलाने प्रत्येक लोकसमूहासाठी एक वेळ निश्चित केली आहे, या ठरलेल्या वेळेपर्यंत तो अवकाश देतो. परंतु, जेव्हा तो समय येऊन ठेपतो, तर मग ते एक घटीका, मागे होऊं शकत नाही की, पुढे सरकूं शकत नाही.

विशेष टिपणी : या ठिकाणी ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे की, जेव्हा निर्मितीतील श्रेष्ठ, पैगंबरांचे सरदार, हजरत मुहम्मद ﷺ सुद्धा कोणाला नफा नुकसान पोहचविण्यांस समर्थ नाहीत, तर आपल्या नंतर मानवांमध्ये, कोण व्यक्ती असूं शकते जी कोणाची इच्छापूर्ती करण्याला आणि संकट निवारण करण्याला समर्थ असेल ? अशाचप्रकारे स्वत: अल्लाहच्या पैगंबराजवळ मदत मागणे, त्यांच्याजवळ फिर्याद करणे, ''या रसूलल्लाह, मदद !'' आणि ''अगिसनी या रसूलुल्लाह!'' वगैरे शब्दांनी याचना व मदत मागणे, कोण्या प्रकारेही योग्य नाही. कारण की हे कुरआनाच्या या महावाक्याच्या, आणि अशाप्रकारच्या दुसऱ्या स्पष्ट शिकवणीच्या विरूद्ध आहे; किंबहुना हे 'शिर्क'च्या अंतर्गत येते. ''फ नाऊजो बिल्लाह् मिन हाजा''

३) म्हणजे शिक्षा ही एक अत्यंत पसंद नसलेली गोष्ट आहे. जिच्यापासून अंत:करण तिरस्कार करते आणि स्वभाव तिला नाकारतात. मग हे तिच्यांत काय चांगुलपणा पाहतात की, तिच्यासाठी घाई करीत आहे ?

أَثُمَّ إِذَا مَا وَقَعَ آمَنْتُمْ بِهِ ۚ آلْآنَ وَقَدْ كُنْتُمْ بِهِ تَسْتَعْجِلُونَ ﴿٥١﴾

काय मग जेव्हा ती येऊनच पडेल, तेव्हा तिला मान्यता द्याल, (की) हां! आता मानले[१]!! वास्तविक तुम्ही इच्छ्याकरता घाई करीत होता. ५१

ثُمَّ قِيلَ لِلَّذِينَ ظَلَمُوا ذُوقُوا عَذَابَ الْخُلْدِ هَلْ تُجْزَوْنَ إِلَّا بِمَا كُنْتُمْ تَكْسِبُونَ ﴿٥٢﴾

मग अत्याचाऱ्यांना सांगण्यात येईल की, नित्याच्या शिक्षेची गोडी चाखा, तुम्हाला तर तुमच्या केल्या सवरल्याचा बदला मिळाला आहे. ५२

وَيَسْتَنْبِئُونَكَ أَحَقٌّ هُوَ ۖ قُلْ إِي وَرَبِّي إِنَّهُ لَحَقٌّ ۖ وَمَا أَنْتُمْ بِمُعْجِزِينَ ﴿٥٣﴾

आणि ते आपणास विचारतात की, काय शिक्षा खरोखरच[२] होणार आहे. आपण सांगून द्या की, होय शपथ आहे, माझ्या पालकर्त्याची की, ती खरोखरच होणार आहे. आणि तुम्ही कोण्याप्रकारे अल्लाहला हरवूंशकणार नाही. ५३

وَلَوْ أَنَّ لِكُلِّ نَفْسٍ ظَلَمَتْ مَا فِي الْأَرْضِ لَافْتَدَتْ بِهِ ۗ وَأَسَرُّوا النَّدَامَةَ لَمَّا رَأَوُا الْعَذَابَ ۖ وَقُضِيَ بَيْنَهُمْ بِالْقِسْطِ ۚ وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ﴿٥٤﴾

आणि जर प्रत्येक व्यक्ती जीने जुलूम (शिर्क) केला आहे त्यांच्या जवळ इतके असेल की, सारी पृथ्वी (त्याच्याने) भरून जाईल, तरी सुद्धा त्याला देऊन, आपला जीव वाचवू इच्छितील[३], आणि जेव्हा शिक्षेला पाहून घेतील, तेव्हा मनातल्यामनात पश्चात्ताप करतील. आणि त्यांचा फैसला, न्यायाने होईल.आणि त्यांच्यावर जुलूम होणार नाही. ५४

أَلَا إِنَّ لِلَّهِ مَا فِي السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ ۗ أَلَا إِنَّ وَعْدَ اللَّهِ حَقٌّ وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٥٥﴾

लक्षात ठेवा की, जितक्या वस्तू आकाशांत आणि पृथ्वीत आहेत, सर्व अल्लाहच्याच मालकीच्या आहेत, लक्षात ठेवा की, अल्लाहचा वायदा खरा आहे; परंतु बहुतेक माणसे विश्वासच ठेवत नाही. ५५

هُوَ يُحْيِي وَيُمِيتُ وَإِلَيْهِ تُرْجَعُونَ ﴿٥٦﴾

तोच प्राण टाकतो, आणि तोच प्राण हरण करतो, आणि तुम्ही सर्व त्याच्याच जवळ आणले[४] जाल ५६

يَا أَيُّهَا النَّاسُ قَدْ جَاءَتْكُمْ مَوْعِظَةٌ مِنْ رَبِّكُمْ وَشِفَاءٌ لِمَا فِي الصُّدُورِ وَهُدًى وَرَحْمَةٌ لِلْمُؤْمِنِينَ ﴿٥٧﴾

अहो लोकांनो! तुमच्याजवळ, तुमच्या पालनकर्त्याजवळून, एक अशी गोष्ट आली आहे; जी उपदेश आहे[५], आणी मनात जो रोग आहे त्याच्याकरिता शिफा आहे[६]. आणि मार्गदर्शन करणारी आहे आणि ईमानवाल्यांसाठी दया[७] आहे. ५७

قُلْ بِفَضْلِ اللَّهِ وَبِرَحْمَتِهِ فَبِذَٰلِكَ فَلْيَفْرَحُوا هُوَ خَيْرٌ مِمَّا يَجْمَعُونَ ﴿٥٨﴾

आपण सांगून टाका की, बस! लोकांना अल्लाहच्या या ईनामावर आणि दयेवर खूष व्हावयास हवे[८]. हे फारच श्रेयस्कर आहे, त्यापेक्षा जे ते गोळा करीत आहेत. ५८

قُلْ أَرَأَيْتُمْ مَا أَنْزَلَ اللَّهُ لَكُمْ مِنْ رِزْقٍ فَجَعَلْتُمْ مِنْهُ حَرَامًا وَحَلَالًا قُلْ آللَّهُ أَذِنَ لَكُمْ ۖ أَمْ عَلَى اللَّهِ تَفْتَرُونَ ﴿٥٩﴾

आपण (यांना) सांगा की,हे तर दाखवा की, अल्लाहने तुमच्यासाठी जी काही रोजी पाठवली होती, मग तुम्ही त्याचा काही भाग हराम, आणि काही हलाल, ठरवून घेतला[९]. आपण त्यांना विचारा की, काय तुम्हास अल्लाहने हुकूम दिला होता, किंवा अल्लाहवर (खोटा) आळ घेता? ५९

وَمَا ظَنُّ الَّذِينَ يَفْتَرُونَ عَلَى اللَّهِ الْكَذِبَ يَوْمَ الْقِيَامَةِ ۗ إِنَّ اللَّهَ لَذُو فَضْلٍ عَلَى النَّاسِ وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَشْكُرُونَ ﴿٦٠﴾

आणि जे लोक अल्लाहवर खोटा आळ घेतात, ते कयामतच्या दिवसाला काय समजून बसले आहेत[१०]? खरोखर लोकांवर अल्लाहतआलाची मोठीच कृपा आहे[११], परंतु बहुतेक माणसे याचे आभार मानत नाही[१२]. ६०

१) परंतु शिक्षा आल्यानंतर, मानण्याचा काय फायदा.

२) म्हणजे ते विचारतात की, हे परतण्याचे ठिकाण व कयामत, आणि माणसांची माती होऊन गेल्यानंतर, त्यांचे दुसऱ्यादा जिवंत होऊन उठणे, एक सत्य गोष्ट आहे? अल्लाहतआलाने फर्माविले, हे पैगंबरा! त्यांना सांगून टाका की, तुमचे माती होऊन मातीत मिसळून जाणे, अल्लाहतआलाला दुसऱ्यादा जिवंत करण्याला असमर्थ करू शकत नाही, म्हणून हे खचित्‌च होऊन राहील. इमाम इब्ने कसीर رحمه الله म्हणतात, या महावाक्यासारखे महावाक्य, कुरआनात

आणखी फक्त दोन महावाक्ये आहेत, ज्यात अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराला हुकूम दिला आहे की, त्याने शपथ खाऊन, या परतण्याच्या ठिकाणाचे घडण्याची (मआद) घोषणा करावी, एक सू.सबा आ.३ आणि दुसरे सू.तगाबून आ.७

३) म्हणजे जर दुनियाभरचा खजिना देऊन, तो शिक्षेपासून सुटून जाईल, तर देण्यासाठी तयार होऊन जाईल. परंतु तेथे कोणाजवळ असेलच काय? अर्थ हा की, शिक्षेपासून सुटण्याचा कुठलाही मार्ग नसेल.

४) या महावाक्यांमध्ये, आकाश आणि पृथ्वीच्या दरम्यान, प्रत्येक वस्तूवर, अल्लाहतआलाच्या संपूर्ण मालकीची, आणि अल्लाहचा वायदा सत्य होण्याचा, जीवन आणि मृत्युवर त्याचा अधिकार, आणि त्याच्या समक्ष सर्वांना हजर होणे, याचे वर्णन आहे. ज्याचा उद्देश्य, मागे घडून गेलेल्या गोष्टींचे समर्थन आणि स्पष्टीकरण आहे, की जे व्यक्तीमत्त्व, इतक्या अधिकारांचे स्वामी आहे, याच्या पकडीपासून वांचून, कोण कुठे जाऊ शकतो? आणि त्याने हिशेब घेण्यासाठी, जो एक दिवस निश्चित करून ठेवला आहे, त्याला कोण टाळू शकतो? खचित्‌च अल्लाहचा वायदा खरा आहे. तो एक दिवस नक्कीच येणार आहे; आणि प्रत्येक पुण्यवान आणि पाप्याला, त्याच्या कर्माप्रमाणे बक्षिशी किंवा शिक्षा दिली जाईल.

५) म्हणजे जो कुरआनाला मनापासून वांचेल, आणि त्याच्या अर्थ आणि उद्देश्यावर चिंतन व मनन करेल, त्याच्यासाठी कुरआन उपदेश आहे. उपदेश करण्याचा खरा अर्थ आहे, शेवट मध्ये परिणामांची आठवण करून देणे. मग ती प्रोत्साहनपर असो किंवा भिवविणारी असो. आणि उपदेशकाचे उदाहरण वैद्यासारखे आहे; जो रोग्याला त्या गोष्टीपासून मना करतो, ज्या त्याच्या शरीर आणि आरोग्याला नुकसानकारक असतात. अशाचप्रकारे कुरआनसुद्धां, प्रोत्साहन आणि भिवविणे, दोन्ही पद्धतींने हितोपदेश करते आणि लोकांना शेवट आणि परिणामापासून सावध करते; ज्यामुळे अल्लाहच्या आज्ञाभंजनामुळे, त्यांना तोंड द्यावे लागेल. आणि त्या कामांपासून मना करते. ज्यामुळे माणसाचे पारलौकीक जीवन उद्ध्वस्त होऊ शकते.

६) म्हणजे अंत:करणांत, एकेश्वरवाद व पैगंबरी आणि सत्य (आणि खऱ्या) श्रद्धा, यांच्या बाबतीत ज्या शंका कुशंका निर्माण होतात. त्यांचे निर्सन, आणि कुफ्र व दांभिकत्त्व यांची जी घाण आणि गंधेपणा निर्माण होत असतो, त्याला स्वच्छ करतो.

७) हे कुरआन ईमानवाल्यांसाठी, मार्गदर्शन आणि दयेला कारणीभूत होते. तसे तर हे कुरआन, सर्व जगांतील लोकांसाठी, मार्गदर्शन आणि दयेला कारणीभूत आहे. परंतु याच्याने लाभान्वयीत फक्त ईमानवालेच होतात. म्हणून येथे फक्त त्यांच्याचकरीता, याला मार्गदर्शन व दया, ठरविण्यांत आले आहे. या विषयाला कुरआन करीममध्ये, सू.बनी इस्राईल आ.८२ आणि सू.अलीफ-लाम-मीम. सज्दह आ.४४ मध्ये सुद्धा वर्णन केले आहे. (तसेच 'हुद्‌ल्‌लिल्‌ मुत्तकीन' सू.बकर: आ.२... चा समास कृपया पहावा)

८) आनंद त्या स्थितीचे नांव आहे, जे कोण्या वांछीत वस्तुच्या प्राप्तीवर, मनुष्याला त्याच्या मनांत जाणवते. ईमानवाल्यांना सांगण्यांत येत आहे की, हे कुरआन अल्लाहची खास कृपा आणि त्याची दया आहे; यावर ईमानवाल्यांना आनंदीत व्हावयास पाहिजे; म्हणजे यांच्या मनांत आणि संतोषाची अवस्था असावयास पाहिजे. याचा हा अर्थ नाही की, खुषीला जाहीर करण्यासाठी, समारंभ, मिरवणूक आणि रोषणाईचा, आणि या प्रकारच्या दुसऱ्या निरर्थक गोष्टींचा, आणि अयोग्य ठिकाणी उधळपट्टी करण्याची व्यवस्था करा. जसे की आजकाल बिदअतवाले, या महावाक्याने, 'जश्ने इदे मिलाद' आणि त्याच्या निरर्थक खर्चाला योग्य असणे सिद्ध करतात. (तपशिलासाठी पहा, लेखकाची पुस्तिका, 'जश्ने इदे् मिलाद' आणि निर्णय देणाऱ्यांच्या पुराव्यांची चांचपणी)

९) याच्याने अभिप्रेत तेच काही जनावरांचे हराम करणे आहे; जे मुशरिकीन आपल्या मूर्तींच्या नांवे सोडून करीत असत. ज्याचा तपशील सू.अन्‌आममध्ये येऊन चुकला आहे.

१०) म्हणजे कयामतच्या दिवशी अल्लाहतआला, त्यांच्याशी काय व्यवहार करील.

११) की, तो मनुष्यांची जगांत लगेच धरपकड करीत नाही; किंबहुना याच्या करिता (त्याने) एक दिवस नक्की करून ठेवला आहे. किंवा अर्थ हा आहे की, तो जगांतील देणग्या, ईमानवाला व काफिर असा भेदभाव केल्याशिवाय, सर्वांना देत असतो. किंवा ज्या गोष्टी मानवांसाठी, फायदेकारक आणि आवश्यक आहेत, त्यांना हलाल आणि योग्य ठरविले आहे; त्यांना हराम केले नाही.

१२) की, अल्लाहच्या देणग्यांचे आभार मानीत नाही; किंवा त्यांच्या हलाल केलेल्या वस्तूंना हराम करून घेतात.

وَمَا تَكُوْنُ فِىْ شَاْنٍ وَّمَا تَتْلُوْا مِنْهُ مِنْ قُرْاٰنٍ وَّلَا تَعْمَلُوْنَ مِنْ عَمَلٍ اِلَّا كُنَّا عَلَيْكُمْ شُهُوْدًا اِذْ تُفِيْضُوْنَ فِيْهِ ؕ وَمَا يَعْزُبُ عَنْ رَّبِّكَ مِنْ مِّثْقَالِ ذَرَّةٍ فِى الْاَرْضِ وَلَا فِى السَّمَآءِ وَلَاۤ اَصْغَرَ مِنْ ذٰلِكَ وَلَاۤ اَكْبَرَ اِلَّا فِىْ كِتٰبٍ مُّبِيْنٍ ۝٦١

**आणि तुम्ही कोण्त्याही स्थितीत काअसेनात. आणि या आपण कुरआन मधून जे काही वाचत असाल वाचतात; आणि तुम्ही जे पण कृत्य करीत असाल, आम्हास (ते) सर्व ठाऊक असते. जेव्हा तुम्ही या कामात मग्न असतात आणि तुमच्या पालनकर्त्याकडून कोणी वस्तू कणाबरोबरसुद्धा लपलेली नाही; न पृथ्वीत न आकाशांत; न कोणी वस्तू याहून लहान, आणि न कोणी वस्तू मोठी; परंतु हे सर्व खुल्या पुस्तकांत (नमुद) आहे[१]. ६१**

اَلَاۤ اِنَّ اَوْلِيَآءَ اللّٰهِ لَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ۝٦٢

**लक्षांत ठेवा की, अल्लाहच्या मित्रांवर[२] न काही भय आहे, न ते दु:खी होतात[३] ६२**

اَلَّذِيْنَ اٰمَنُوْا وَكَانُوْا يَتَّقُوْنَ ۝٦٣

**ते,ते आहेत, ज्यांनी ईमान आणले, आणि (अल्लाहस) भीत राहिलेत ६३**

१) या महावाक्यात अल्लाहतआलाने, नबी ﷺ आणि ईमानवाल्यांना संबोधित करून सांगितले की, तो सर्व निर्मितीच्या अहवालांना जाणून आहे. आणि प्रत्येक क्षण आणि प्रत्येक घटका, मनुष्यांवर त्याची नजर आहे. जमीन व आकाशाची कोणी मोठी लहान वस्तू, त्याच्यापासून गुप्त नाही. हा तोच विषय आहे, जो याचे पूर्वी सू.अन्आम आ.५९ मध्ये येऊन चुकला आहे. ''की त्याचेजवळ अदृष्टाचे खजीने आहेत. ज्यांना तोच जाणतो. त्याला अरण्य आणि समुद्राच्या सर्व वस्तूचे ज्ञान आहे. आणि कुठेही पान गळून पडत नाही; परंतु तो त्याला जाणतो. आणि जमिनीच्या अंध:कारात; कोणी दाणा आणि कोणी हिरवी आणि वाळलेली वस्तू नाही, परंतु खुल्या पुस्तकांत (लिहिलेली) आहे'' अशाचप्रकारे सू.अन्आमची आ.३८, आणि सू.हूदची आ.६ मध्ये सुद्धा या विषयाला वर्णन केले गेले आहे. जेव्हा वास्तव हे आहे की, तो आकाशात आणि पृथ्वीत असलेल्या वस्तूच्या हालचालींना जाणतो. तर मग तो मनुष्ये आणि जिन्नांच्या त्या हालचाली आणि कर्मांपासून, का म्हणून अजाण राहू शकतो? जे अल्लाहच्या भक्तित जे साठीच निर्माण केले गेलेले आहेत.

२) आज्ञाभंजकांच्या नंतर, अल्लाहतआला आपल्या आज्ञाधारकांचा उल्लेख करीत आहे. आणि ते आहेत अवलिया अल्लाह (अल्लाहचे मित्र) अवलिया वलीचे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ शब्दकोषांत 'जवळचे' (असा) आहे. या अनुषंगाने अवलिया अल्लाहचा अर्थ होईल, ते खरे आणि प्रांजळ ईमानवाले, ज्यांनी अल्लाहचे आज्ञापालन करून व अपराधांपासून वाचून, अल्लाहची जवळीक प्राप्त करून घेतली. म्हणून पुढील महा वाक्यांत, स्वत: अल्लाहतआलाने सुद्धा त्यांची प्रशंसा, या शब्दात वर्णन केली, ज्यांनी ईमान आणले आणि ज्यांनी ईशभय बाळगले, आणि ईशभयच अल्लाहच्या जवळीकेचे आधारस्तंभ आहेत; आणि महत्त्वाचे साधन आहे. या अनुषंगाने प्रत्येक ईमानवाला आणि अल्लाहचे भय बाळगणारा अल्लाहचा वली आहे. लोक अल्लाहच्या मैत्रीसाठी चमत्कार दाखविण्याला आवश्यक समजतात. आणि मग ते आपल्या बनविलेल्या 'वली' साठी खोटे खरे चमत्कार, प्रसिद्ध करतात. ही कल्पना बिलकुल चुकीची आहे. चमत्कार दाखविण्याचा आणि अल्लाहच्या मैत्रीचा घनदाट संबंध नाही, आणि त्यासाठी अटपण नाही. ही एक वेगळी गोष्ट आहे की, जर कोणाकडून चमत्कार जाहीर होऊन जाईल, तर अल्लाहची मर्जी आहे. यात त्या शक्ती शामील नाही. परंतु कोण्या परहेजगार ईमानवाला आणि सुन्नतचा ताबेदार याच्याकडून चमत्काराचे प्रदर्शन होवो, किंवा होऊ नये, त्याच्या विलायतीत (अल्लाहशी मैत्रीत) काही शंका नाही.

३) भयाचा संबंध भविष्याशी आहे. आणि दु:खाचा संबंध भूतकाळाशी. अर्थ आहे की, ज्या अर्थी, त्यांनी जीवन ईशभयासह घालवलेले असते, म्हणून कयामतच्या कठीणावस्थेचे एवढे भय त्यांच्यावर असणार नाही; ज्याप्रमाणे दुसऱ्यांवर असेल, किंबहुना ते आपल्या ईमान आणि ईशभयामुळे अल्लाहची दया आणि खास कृपेचे उम्मीदवार आणि त्यांच्या बरोबर चांगला गुमान बाळगणारे असतील. अशाचप्रकारे जगांत, ते जे काही सोडून गेले असतील किंवा जगाची गोडी त्यांना प्राप्त होऊं शकली नसेल, याच्यावर त्यांना काही दु:ख आणि खेद वाटणार नाही. एक दुसरा अर्थ हा पण आहे की, जगांत ज्या वांछीत वस्तू त्यांना मिळाल्या नसतील, यावर ते दु:ख आणि खेदाचे प्रदर्शन करीत नाही. कारण की त्यांना ठाऊक आहे की, हे सर्व अल्लाहच्या हुकुमाप्रमाणे आहे. ज्यामुळे त्यांच्या मनांत कुठलाही दु:ख आणि खेद निर्माण होत नाही; किंबहुना त्यांची मने, अल्लाहच्या मर्जीवर आनंदीत आणि समाधानी राहतात.

لَهُمُ الْبُشْرٰى فِى الْحَيٰوةِ الدُّنْيَا وَفِى الْاٰخِرَةِ ؕ لَا تَبْدِيْلَ لِكَلِمٰتِ اللّٰهِ ؕ ذٰلِكَ هُوَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ﴿٦٤﴾

त्यांच्यासाठी ऐहिक जीवनांत पण[१], आणि परलोकांतपण शुभवर्तमान आहे. अल्लाहतआलाच्या गोष्टीत काही फरक होत नसतो हे मोठेच साफल्य आहे. (६४)

وَلَا يَحْزُنْكَ قَوْلُهُمْ ۘ اِنَّ الْعِزَّةَ لِلّٰهِ جَمِيْعًا ؕ هُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٦٥﴾

आणि आपणास त्यांच्या गोष्टी दु:खदायक वाटू नये. सर्व वर्चस्व अल्लाहकरताच आहे; तो ऐकतो आणि जाणतो (६५)

اَلَاۤ اِنَّ لِلّٰهِ مَنْ فِى السَّمٰوٰتِ وَمَنْ فِى الْاَرْضِ ؕ وَمَا يَتَّبِعُ الَّذِيْنَ يَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ شُرَكَآءَ ؕ اِنْ يَّتَّبِعُوْنَ اِلَّا الظَّنَّ وَاِنْ هُمْ اِلَّا يَخْرُصُوْنَ ﴿٦٦﴾

लक्षांत असू द्या की, जे काही आकाशांत आहे आणि जे काही जमिनीत आहे, ते सर्व अल्लाहचेच आहेत. आणि जे लोक अल्लाहला सोडून दुसऱ्या सरकतदारांची भक्ती करीत आहेत, कोणत्या गोष्टीचे अनुकरण करतात? निव्वळ तर्क वितर्कावर चालतात, आणि वहिमाच्या गोष्टी करतात[२] (६६)

هُوَ الَّذِىْ جَعَلَ لَكُمُ الَّيْلَ لِتَسْكُنُوْا فِيْهِ وَالنَّهَارَ مُبْصِرًا ؕ اِنَّ فِىْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّقَوْمٍ يَّسْمَعُوْنَ ﴿٦٧﴾

तो असा आहे ज्याने तुमच्यासाठी रात्र बनविली; कारण की तिच्यात विश्रांती घ्यावी; आणि दिवसपण अशाप्रकारे बनविला की, पहाण्यासवरण्याचे साधन आहे. याच्यांत निशाण्या आहेत, त्या लोकांसाठी, जे ऐकतात (६७)

قَالُوا اتَّخَذَ اللّٰهُ وَلَدًا سُبْحٰنَهٗ ؕ هُوَ الْغَنِىُّ ؕ لَهٗ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الْاَرْضِ ؕ اِنْ عِنْدَكُمْ مِّنْ سُلْطٰنٍۢ بِهٰذَا ؕ اَتَقُوْلُوْنَ عَلَى اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿٦٨﴾

ते म्हणतात की, अल्लाह संतती बाळगतो; तो त्याच्यापासून पवित्र आहे! तो कोणाचा गरजवंत नाही[३]. त्याचेच राज्य आहे. जे काही आकाशांत आहे,आणि जे काही जमिनीत आहे[४], तुमच्याजवळ यावर काही प्रमाण नाही. काय अल्लाहकडे अशी गोष्ट लावतात, जिचे तुम्हाला काही ज्ञान नाही. (६८)

قُلْ اِنَّ الَّذِيْنَ يَفْتَرُوْنَ عَلَى اللّٰهِ الْكَذِبَ لَا يُفْلِحُوْنَ ﴿٦٩﴾

आपण सांगून टाका की, जे लोक अल्लाहवर खोटा आळ घेतात[५], ते सफल होणार नाहीत[६] (६९)

مَتَاعٌ فِى الدُّنْيَا ثُمَّ اِلَيْنَا مَرْجِعُهُمْ ثُمَّ نُذِيْقُهُمُ الْعَذَابَ الشَّدِيْدَ بِمَا كَانُوْا يَكْفُرُوْنَ ﴿٧٠﴾

ही जगात थोडीशी चैन आहे, मग आमच्याजवळ त्यांना यावयाचे आहे. मग आम्ही त्यांना, त्यांच्या 'कुफ्र' च्या बदल्यात कडक शिक्षेची गोडी चाखवू (७०)

وَاتْلُ عَلَيْهِمْ نَبَاَ نُوْحٍ ۘ اِذْ قَالَ لِقَوْمِهٖ يٰقَوْمِ اِنْ كَانَ كَبُرَ عَلَيْكُمْ مَّقَامِىْ وَتَذْكِيْرِىْ بِاٰيٰتِ اللّٰهِ فَعَلَى اللّٰهِ تَوَكَّلْتُ فَاَجْمِعُوْۤا اَمْرَكُمْ وَشُرَكَآءَكُمْ ثُمَّ لَا يَكُنْ اَمْرُكُمْ عَلَيْكُمْ غُمَّةً ثُمَّ اقْضُوْۤا اِلَىَّ وَلَا تُنْظِرُوْنِ ﴿٧١﴾

आणि आपण त्यांना नूहची गोष्ट वाचवून ऐकवा, जेव्हा की त्यांनी आपल्या लोकांना सांगितले, हे माझ्या समाज बांधवांनो! जर तुम्हास माझे रहाणे आणि अल्लाहच्या आदेशांचा उपदेश करणे, जड वाटत आहे, तर माझा तर अल्लाहवरच भरोसा आहे. तुम्ही आपली युक्ती, आपल्या सरकतदारांबरोबर पक्की करून घ्या[७]. मग तुमची युक्ती, तुमचा दम घुटण्याला, कारणीभूत न व्हावयास पाहिजे[८]. मग माझ्या बरोबर, (जे करावयाचे) ते करून टाका, आणि मला अवकाश देऊ नका (७१)

فَاِنْ تَوَلَّيْتُمْ فَمَا سَاَلْتُكُمْ مِّنْ اَجْرٍ ؕ اِنْ اَجْرِىَ اِلَّا عَلَى اللّٰهِ ۙ وَاُمِرْتُ اَنْ اَكُوْنَ مِنَ الْمُسْلِمِيْنَ ﴿٧٢﴾

मग तरीसुद्धा तुम्ही आक्षेपच घेत राहिला तर मी तुमच्यापासून काही वेतन तर मागितले नाही[९]; माझे वेतन तर फक्त अल्लाहकडेच आहे. आणि मला हुकूम केला गेला आहे की, मी मुसलमानां मधून होऊन राहू[१०] (७२)

१) जगात शुभवर्तमानाने अभिप्रेत, खरे स्वप्न, किंवा ती खुषखबर आहे, जी मृत्युच्या वेळेस, देवदूत एका ईमानवाल्यांला देतात; जसे की कुरआन आणि हदीसने सिद्ध आहे.

२) म्हणजे अल्लाहच्या बरोबर कोणाला सरकतदार ठरविणे, कोण्या पुराव्याच्या आधारावर नाही. परंतु केवळ गुमान

व अंदाज आणि मत आणि कयासाने घडविलेली चमत्कारीत गोष्ट आहे. आज जर मनुष्य आपल्या बुद्धी आणि समजचा योग्य तऱ्हेने उपयोग करील, तर नक्कीच त्याच्यावर स्पष्ट होऊ शकते की, अल्लाहचा कोणी सरकतदार नाही. आणि ज्याप्रमाणे तो आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीत एकटा आहे, कोणी त्याचा सरकतदार नाही; तर मग उपासनेंत, दुसरे का म्हणून त्याचे सरकतदार व्हावेत?

३) आणि जो कोणावर अवलंबून नाहीं, त्याला संततीची पण आवश्यकता नाही. कारण की, संतती तर आधारासाठीच असते. आणि जेव्हा तो आधाराकडून निरपेक्ष आहे, तर मग त्याला संततीची काय आवश्यकता ?

४) जेव्हा आकाश आणि पृथ्वीची प्रत्येक वस्तूं, त्याची निर्मित आणि दास आहे. मग त्याला संततीची आवश्यकताच काय आहे? संतती ची आवश्यक्ता तर त्याला अस्ते. ज्याला काही मदत आणि आधाराची आवश्यकता असावी. आणि ज्याचा हुकूम आकाश आणि पृथ्वीच्या प्रत्येक वस्तुंवर चालत असावा, त्याला काय आवश्यकता येऊन पडू शकते? याच्या शिवाय, संततीच्या आवश्यकता तो मनुष्य पण जाणतो, जो आपल्यानंतर राज्याचा वारस पहाणे किंवा बनवणे पसंत करतो. आणि अल्लाहतआलाच्या व्यक्तीमत्त्वाला तर नष्ट होणेच नाही. यासाठी अल्लाहसाठी संतती ठरविणे, इतका मोठा अपराध आहे की, अल्लाहतआला फर्मावितो, ''या गोष्टीने की, ते म्हणतात, रहमानची संतती आहे. जवळ आहे की आकाश फाटून पडावे, धरणी दुभंगून जावी, आणि पर्वत कण कण होऊन जावेत.'' (सू.मर्यम - ९०-९१)

५) इफतेराचा अर्थ, खोटी गोष्ट बोलण्याचा आहे. याच्यानंतर आणखी 'खोटे' ची वाढ ताकीद करण्यासाठी आहे.

६) याने स्पष्ट आहे की, सफलतेने अभिप्रेत, परलोकाची सफलता, म्हणजे अल्लाहच्या क्रोधापासून आणि शिक्षेपासून वाचून जाणे आहे. केवळ ऐहिक तात्कालिक संपन्नता सफलता नाही. जसे की, बहुतेक लोक, काफिरांच्या तात्पुरत्या सुसंपन्नतेने, चुकीच्या समजाला आणि शंका कुशंकेला बळी पडतात. याचसाठी पुढील महा वाक्यांत फरमाविले, की, ''यांनी जगांत थोडीशी चैन, करुन घ्यावी मग आमच्याचजवळ त्यांना येणे आहे.'' म्हणजे ही जगातील चैन परलोकाच्या तुलनेत, फारच थोडीशी आहे, जी मर्यादित आणि फारच थोड्या काळासाठी आहे. याच्यानंतर त्यांना कडक शिक्षेचा सामना करावा लागेल, यासाठी या गोष्टीला चांगले समजून घेतले पाहिजे की, काफिर, मुशरिक आणि अल्लाहच्या आज्ञाभंजकाची ऐहिक सुसंपन्नता, आणि भौतिक प्रगत्या, या ह्या गोष्टीचा पुरावा नाहीत, की हे समाज सफल आहेत; आणि अल्लाहतआला त्यांचेशी खूष आहे. हे भौतिक साफल्य, त्यांच्या सतत प्रयत्नांचे फळ आहे. जे जाहीर साधन सामुग्रीच्या प्रमाणांत प्रत्येक त्या समाजाला प्राप्त होऊं शकते; जे साधनांना कामास लावून त्यांच्या सारखी मेहनत करतील; मग तो ईमानवाला असो किंवा काफिर. याच्याशिवाय, हे तात्कालिक साफल्य, अल्लाहच्या, सूट देण्यामुळे असूंशकतो.

७) म्हणजे ज्यांना तुम्ही अल्लाहचा सरकतदार ठरवून ठेवला आहे, त्यांची मदत पण मिळवून घ्या. (जर ते तुमच्या गुमान प्रमाणे, तुमची मदत करूशकतात.)

८) 'गुम्मतन्' चा दुसरा अर्थ आहे, स्पष्ट न सांगणे आणि गुप्तता. म्हणजे माझ्या विरूद्ध तुमची युक्ती स्पष्ट,परंतु गुप्त नसावयास हवी.

९) की ज्यामुळे, तुम्ही हा आळ घेऊ शकाल, की पैगंबरीच्या दाव्याने, त्याचा उद्देश्य धन संपत्तीचे गोळा करणे आहे.

१०) ह.नूह عليه السلام च्या या म्हणण्याने, पण ठाऊक होते की, सर्व पैगंबरांचा धर्म इस्लामच राहिला आहे; जरी धर्मशास्त्र वेगळे आणि पद्धत अनेक राहिलेत. जसे की महावाक्य, ''तुमच्यातून प्रत्येकासाठी आम्ही एक दस्तूर आणि मार्ग नक्की करून दिला आहे.'' (सू.माईद : ४८) ने स्पष्ट आहे. परंतु धर्म सर्वांचा इस्लाम होता. कृपया पहावे, सू.बकर १३१-१३२, सू.नमल-९१, सू.यूसुफ-१०१, सू.यूनुस-८४, सू.आअराफ-१२६, सू.नमल-४४, माईद: ४४ आणि १११, आणि सू.अन्आम०१६२-१६३

فَكَذَّبُوْهُ فَنَجَّيْنٰهُ وَمَنْ مَّعَهٗ فِى الْفُلْكِ وَجَعَلْنٰهُمْ خَلٰٓئِفَ وَاَغْرَقْنَا الَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا ۚ فَانْظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُنْذَرِيْنَ ﴿٧٣﴾

तरी ते लोक त्यांना खोटे ठरवित[१] राहिले. मग आम्ही त्यांना आणि जे लोक त्यांच्याबरोबर नावेत होते, त्यांना सुटका दिली आणि त्यांना वारस केले आणि[२] ज्यांनी आमच्या निशाण्यांना खोटे ठरविले होते, त्यांना बुडवून टाकले. तर पहावयास हवे (की त्यांचा) कसा शेवट झाला; त्या लोकांचा ज्यांना भिवविण्यात आले होते. ७३

ثُمَّ بَعَثْنَا مِنْۢ بَعْدِهٖ رُسُلًا اِلٰى قَوْمِهِمْ فَجَآءُوْهُمْ بِالْبَيِّنٰتِ فَمَا كَانُوْا لِيُؤْمِنُوْا بِمَا كَذَّبُوْا بِهٖ مِنْ قَبْلُ ؕ كَذٰلِكَ نَطْبَعُ عَلٰى قُلُوْبِ الْمُعْتَدِيْنَ ﴿٧٤﴾

मग, नूह नंतर आम्ही, आणखी पैगंबरांना या लोकांकडे पाठविले; तर हे त्यांच्याजवळ प्रकाशमय प्रमाणे घेऊन आले[३]. मग ज्या गोष्टीला पहिल्यांदाच खोटे म्हणून टाकले, असे झाले नाही की, मग त्याला मानून घेते[४]. अल्लाहतआला अशाप्रकारे मर्यादेहून पूढे जाणाऱ्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून टाकतो[५]. ७४

ثُمَّ بَعَثْنَا مِنْۢ بَعْدِهِمْ مُّوْسٰى وَهٰرُوْنَ اِلٰى فِرْعَوْنَ وَمَلَا۟ئِهٖ بِاٰيٰتِنَا فَاسْتَكْبَرُوْا وَكَانُوْا قَوْمًا مُّجْرِمِيْنَ ﴿٧٥﴾

मग या पैगंबरांनंतर, आम्ही मूसा व हारूनला[६] फिरऔन आणि त्याच्या सरदारांकडे आपल्या निशाण्या देऊन पाठविले[७]. तेव्हा त्यांनी गर्व केला आणि ते लोक अपराधी प्रवृत्तीचे होते[८]. ७५

فَلَمَّا جَآءَهُمُ الْحَقُّ مِنْ عِنْدِنَا قَالُوْٓا اِنَّ هٰذَا لَسِحْرٌ مُّبِيْنٌ ﴿٧٦﴾

मग जेव्हा त्यांना, आमच्याकडून, खरी निशाणी पोहचली, तर ते लोक म्हणू लागले की, हा खचित्‌च खुला जादू आहे[९]. ७६

१) म्हणजे ह.नूह عليه السلام च्या लोकांनी सर्व हितोपदेश ऐकून सुद्धा, नाकारण्याचा मार्ग सोडला नाही; म्हणून अल्लाहतआलाने, ह.नूह عليه السلام ला आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांना, एका नांवेत बसवून, वाचवून घेतले; आणि बाकी सर्वांना, येथपावेतो की, ह.नूह عليه السلام च्या एका मुलाला सुद्धा बुडवून टाकले.

२) म्हणजे जमिनीत, या वाचणाऱ्यांना मागील लोकांचा वारस बनविले. मग मनुष्यांचा पुढील वंश, याच लोकांपासून, विशेषत: ह.नूह عليه السلام चे तीन पुत्रांनी चालला. म्हणूनच ह.नूह عليه السلام ला 'दुसरे आदम' म्हणण्यांत येते.

३) म्हणजे अशा निशाण्या आणि चमत्कार घेऊन आले, जे या गोष्टीवर प्रमाणित करीत होते, की, खरोखर हे अल्लाहचे खरे पैगंबर आहेत, ज्यांना अल्लाहतआलाने मार्गदर्शन आणि हिदायतसाठी पाठविले आहे.

४) परंतु या लोकसमूहांनी पैगंबरांच्या आवाहनावर ईमान आणले नाही. केवळ यासाठी की, जेव्हा पहिल्याप्रथम, हे पैगंबर त्यांच्याजवळ आले, तर लगेच, चिंतन व मनन केल्याशिवाय, त्यांना नाकारून टाकले. आणि हे पहिल्या वेळचे नाकारणे, त्यांच्यासाठी कायमचा न मानण्याचे कारण बनून गेला. आणि ते हाच विचार करत राहिले की, आम्ही तर पूर्वीच नाकारून चुकलो आहोत, आता त्याला काय मानावे ? परिणामी, ते ईमानपासून वंचित्‌ राहिले.

५) म्हणजे ज्याप्रमाणे या मागील लोकसमूहांवर, त्यांच्या कुफ्र आणि खोटे ठरविण्याच्या कारणाने मोहरा लागत राहिल्या आहेत; अशाचप्रकारे आता सुद्धा, जे लोक पैगंबराला खोटे म्हणतील व अल्लाहच्या निशाण्यांना नाकारतील, त्यांच्या अंत:करणावर मोहोर लागत राहील. आणि ते हिदायतपासून वंचित्‌ राहतील, ज्याप्रमाणे मागील लोक वंचित्‌ राहिले.

६) पैगंबरांच्या सर्वसाधारण उल्लेखांनंतर, ह.मूसा عليه السلام व ह.हारून عليه السلام चा उल्लेख केला जात आहे. वास्तविक पैगंबरांच्या अंतर्गत ते पण येऊन जातात. परंतु कारण की, यांचा सुमार प्रतिष्ठीत पैगंबरांमध्ये केला जातो, म्हणून, खास म्हणून यांचा उल्लेख वेगळा केला.

७) ह.मूसा عليه السلام चे हे चमत्कार खास म्हणून ९ 'खुल्या निशाण्या' ज्यांचा उल्लेख अल्लाहने सू.बनी इस्राईल आ.१०१ मध्ये केला आहे; प्रसिद्ध आहेत.

८) म्हणजे, कारण की, ते मोठे मोठे अपराध आणि गुन्ह्यांची सवय लागलेले होते, म्हणून त्यांनी, अल्लाहने पाठविलेल्या पैगंबराबरोबर गर्वाचा व्यवहार केला. कारण की एक गुनाह, दुसऱ्या गुनाहला कारण बनतो. आणि गुन्ह्यावर अडून राहणे मोठे मोठे गुन्हा करण्याला प्रवृत्त करीत.

९) जेव्हा नाकारण्याला काही परिपूर्ण प्रमाण नसते, तर त्यापासून सुटका करून घेण्यासाठी, सांगून टाकतात की, ही तर जादू आहे.

قَالَ مُوْسٰٓى اَتَقُوْلُوْنَ لِلْحَقِّ لَمَّا جَآءَكُمْ ؕ اَسِحْرٌ هٰذَا ؕ وَلَا يُفْلِحُ السّٰحِرُوْنَ ﴿٧٧﴾

मूसाने म्हटले की, काय तुम्ही या स्पष्ट निशाणी नंतर, जी तुमच्याजवळ येऊन पोहोचली; अशी गोष्ट करतात की, काय ही जादू आहे? वास्तविक जादूगीर सफल होत नसतात[१]. (७७)

قَالُوْٓا اَجِئْتَنَا لِتَلْفِتَنَا عَمَّا وَجَدْنَا عَلَيْهِ اٰبَآءَنَا وَتَكُوْنَ لَكُمَا الْكِبْرِيَآءُ فِى الْاَرْضِ ؕ وَمَا نَحْنُ لَكُمَا بِمُؤْمِنِيْنَ ﴿٧٨﴾

ते लोक म्हणू लागले, काय तुम्ही आमच्याजवळ यासाठी आला आहात, आम्हास त्या पद्धतीपासून हटवून टाकावे; ज्यावर आम्ही आमच्या वाडवडीलांना चालतांना पावलो आहोत; आणि तुम्हा दोघांस जगात बढाई व्हावी [२]? आणि आम्ही तुम्हा दोघांस कधीही मानणार नाही. (७८)

وَقَالَ فِرْعَوْنُ ائْتُوْنِىْ بِكُلِّ سٰحِرٍ عَلِيْمٍ ﴿٧٩﴾

आणि फिरऔनाने म्हटले की माझ्याजवळ सर्व कुशल जादुगिरांना आणून हजर करा. (७९)

فَلَمَّا جَآءَ السَّحَرَةُ قَالَ لَهُمْ مُّوْسٰٓى اَلْقُوْا مَآ اَنْتُمْ مُّلْقُوْنَ ﴿٨٠﴾

मग जेव्हा जादूगार आले, तेव्हा मूसाने त्यांना म्हटले, टाका! जे काही तुम्हास टाकावयाचे आहे. (८०)

فَلَمَّآ اَلْقَوْا قَالَ مُوْسٰى مَا جِئْتُمْ بِهِ ۙ السِّحْرُ ؕ اِنَّ اللّٰهَ سَيُبْطِلُهٗ ؕ اِنَّ اللّٰهَ لَا يُصْلِحُ عَمَلَ الْمُفْسِدِيْنَ ﴿٨١﴾

तर मग, जेव्हा त्यांनी टाकले, तेव्हा मूसाने म्हटले की, हे जे काही तुम्ही आणले आहे, जादू आहे; निश्चित गोष्ट आहे की, अल्लाह् त्याला आतां(एका पळांत) नाहीशी करून टाकत आहे[३]. अल्लाह अशा फिसादखोरांचे,काम बनू देत नाही[४]. (८१)

وَيُحِقُّ اللّٰهُ الْحَقَّ بِكَلِمٰتِهٖ وَلَوْ كَرِهَ الْمُجْرِمُوْنَ ﴿٨٢﴾ ع ٨ ١٢ ١٣

८ १२ १३ आणि अल्लाहतआला, खऱ्या प्रमाणाला आपल्या आदेशा प्रमाणे[५] सिद्ध करून देतो. मग अपराध्याला कितीही असह्य वाटेना! (८२)

१) ह.मूसा (अलैहिस्सलाम) नी म्हटले, जरा विचार तर करा, सत्याचे आवाहन आणि खऱ्या गोष्टीला तुम्ही जादू म्हणता, काय ही जादू आहे? जादूगार तर सफलच होत नसतात. म्हणजे वांछित उद्देश्य प्राप्त करण्याला. आणि नावडत्या परिणामापासून, वांचण्यात ते अयशस्वीच राहतात. आणि मी तर अल्लाहचा पैगंबर आहे; मला अल्लाहची मदत प्राप्त आहे. आणि त्याच्याकडून मला चमत्कार आणि खुल्या निशाण्या देण्यात आल्या आहेत. मला जादू टोण्याची गरजच काय आहे? आणि अल्लाहच्या दिलेल्या चमत्काराच्या मुकाबल्यात याची काय किंमत आहे?

२) या नाकारणाऱ्यांचे दुसरे, निष्कारण वितंडवाद आहेत जो प्रमाणांनी, असमर्थ बनून, सादर करतात. एक हा की तुम्ही आम्हास आमच्या वाडवडीलांच्या मार्गावरून हटवू इच्छितात. दुसरे हे की, आम्हास मानमर्तबा व राज्य प्राप्त आहे; त्याला आमच्यापासून हिसकावून, त्यावर स्वत: कब्जा करू इच्छितात. म्हणून आम्ही तर कधी सुद्धा, तुमच्यावर ईमान आणणार नाही. म्हणजे वाडवडीलांच्या अंधानुकरणावर अडून राहणे, आणि ऐहिक प्रतिष्ठा आणि मानमर्तबाच्या इच्छेने, त्यांना ईमान आणण्यापासून अडवून ठेवले. याच्यानंतर पुढे तोच किस्सा आहे की, फिरऔनाने, कुशल जादुगिरांना बोलाविले, आणि ह.मूसा (अलैहिस्सलाम) आणि जादुगिरांचा सामना झाला, जसे की, सू.आअराफ मध्ये येऊन चुकले, आणि सू.ताहा मध्ये सुद्धा याचा काही तपशील येईल.

३) अलबत्ता, असेच झाले! काय, खोटे सुद्धा, सत्याच्या मुकाबल्यात यशस्वी होऊ शकते? जादुगिरांनी, जरी ते आपल्या कलेत कितीही उच्च दर्जाला पोहचलेले होते, जे काही सादर केले, तो जादूच होता; आणि नजरबंदीच होती. आणि मग जेव्हा ह.मूसा (अलैहिस्सलाम) नी, अल्लाहच्या हुकूमाने आपली लाठी फेंकली, तर तिने सर्व चालाकीला एका क्षणांत नष्ट करून टाकले.

४) आणि हे जादूगार पण फिसादखोर होते. त्यांनी केवळ ऐहिक फायदे मिळविण्यासाठी जादूची कला शिकलेली होती. आणि जादूचे कर्तब दाखवून लोकांना मूर्ख बनवित होते. अल्लाहतआला त्यांच्या या फिसादाच्या कामाला कशाप्रकारे योग्य करु शकत होता?

५) या शब्दांनी अभिप्रेत ती प्रमाणे आणि पुरावे आहेत, जी अल्लाहतआला आपल्या पुस्तकांत उतारत असतो. जी पैगंबरांना देत असतो; किंवा ते चमत्कार (मोजेजा) आहेत, जे अल्लाहतआलाच्या हुकुमाने पैगंबरांच्या हातून सादर होत असत. किंवा अल्लाहचा तो हुकूम आहे, जो तो शब्द 'कुन' ने सादर करीत असतो.

فَمَآ اٰمَنَ لِمُوْسٰٓى اِلَّا ذُرِّيَّةٌ مِّنْ قَوْمِهٖ عَلٰى خَوْفٍ
مِّنْ فِرْعَوْنَ وَمَلَا۟ئِهِمْ اَنْ يَّفْتِنَهُمْ ۗ وَاِنَّ فِرْعَوْنَ
لَعَالٍ فِى الْاَرْضِ ۚ وَاِنَّهٗ لَمِنَ الْمُسْرِفِيْنَ ﴿٨٣﴾

**मग मूसावर त्यांच्या लोकांतून फक्त काही थोड्याश्या लोकांनीच ईमान आणले[१]; ते पण फिरऔन आणि त्याच्या अधिकाऱ्यांशी भीत भीत, की, कोठे त्यांना त्रास न द्यावा[२]; आणि खरोखर फिरऔन त्या देशांत, सामर्थ्य व शक्ती बाळगत होता. आणि खचितच (ही गोष्ट पण होती की) तो मर्यादेबाहेर निघून जात होता[३]. (८३)**

وَقَالَ مُوْسٰى يٰقَوْمِ اِنْ كُنْتُمْ اٰمَنْتُمْ بِاللّٰهِ فَعَلَيْهِ
تَوَكَّلُوْٓا اِنْ كُنْتُمْ مُّسْلِمِيْنَ ﴿٨٤﴾

**आणि मूसाने सांगितले की हे माझ्या लोकांनो! जर तुम्ही अल्लाहवर ईमान ठेवतात; तर त्यावरच भरोसा करा; जर तुम्ही मूसलमान आहात[४] (८४)**

فَقَالُوْا عَلَى اللّٰهِ تَوَكَّلْنَا ۚ رَبَّنَا لَا تَجْعَلْنَا فِتْنَةً
لِّلْقَوْمِ الظّٰلِمِيْنَ ﴿٨٥﴾

**त्यांनी म्हटले की, आम्ही अल्लाहवरच भरोसा केला. हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास त्या जालीमांची कसोटी बनवू नकोस (८५)**

وَنَجِّنَا بِرَحْمَتِكَ مِنَ الْقَوْمِ الْكٰفِرِيْنَ ﴿٨٦﴾

**आणि आम्हास आपल्या दयेने या काफिर लोकांपासून सुटका दे[५] (८६)**

وَاَوْحَيْنَآ اِلٰى مُوْسٰى وَاَخِيْهِ اَنْ تَبَوَّاٰ لِقَوْمِكُمَا
بِمِصْرَ بُيُوْتًا وَّاجْعَلُوْا بُيُوْتَكُمْ قِبْلَةً وَّاَقِيْمُوا
الصَّلٰوةَ ۗ وَبَشِّرِ الْمُؤْمِنِيْنَ ﴿٨٧﴾

**आणि आम्ही मूसा आणि त्याच्या भावाजवळ 'वह्य' पाठविले की, तुम्ही दोघे, आपल्या त्या लोकांसाठी, 'मिस्त्र' मध्ये आपली घरे कायम ठेवा; आणि तुम्ही सर्व, आपल्या त्याच घरांना मशीदी मुकर्रर करा[६]. आणि नमाजीचे पाबंद रहा; आणि आपण मुसलमानांना खुषखबर देऊन द्या (८७)**

१) 'कौमेहि' च्या ही च्या मरजात भाष्यकारांचा मतभेद आहे. काहींनी याचा संबंध, ह.मूसा. عليه السلام ला ठरविले आहे. कारण की, महावाक्यांत 'जमीर' च्या पूर्वी, त्यांचाच उल्लेख आहे. म्हणजे मूसांच्या लोकांत, थोड्याशा लोकांनी ईमान आणले. परंतु इमाम इब्ने कसीर वगैरेंनी, याचा 'मरजा' फिरऔनला ठरविले आहे. म्हणजे फिरऔनच्या लोकांमधून, थोड्याशा लोकांनी ईमान आणले. त्याचे प्रमाण हे आहे की, बनी इस्राईलचे लोक तर एक पैगंबर आणि मुक्तीदाताच्या प्रतिक्षेत होते. जे त्यांना ह.मूसा. عليه السلام च्या स्वरूपांत मिळून गेले; आणि या अनुषंगाने, सर्व बनी इस्राईल (कारून शिवाय) त्यांच्यावर ईमान ठेवत होते. म्हणून खरी गोष्ट हीच आहे की, ''जुर्रिय्यतून मिन कौमेहि'' ने अभिप्रेत, फिरऔनच्या लोकांतून, थोडेसे लोक, आहेत; ज्यांनी ह.मूसा. عليه السلام वर ईमान आणले; त्यांच्यातूनच, त्याची पत्नी (ह.आसीया) पण आहे.

२) कुरआन करीमची ही 'स्पष्टोक्ती' पण या गोष्टीला प्रमाणित करते, की हे ईमान आणणारे थोडेसे लोक, फिरऔनच्या लोकांमधून होते. कारण की, त्यांनाच फिरऔन आणि त्याचे दरबारी आणि अधिकारी यांच्याकडून त्रास होण्याची भीती होती. बनी इस्राईल तसे तर, फिरऔनच्या गुलामी आणि अधिपत्याचा अपमान एका काळापासून सहन करत होते; परंतु ह.मूसा عليه السلام वर ईमान आणल्यामुळे याचा काही संबंध नव्हता; न त्यांना, या कारणाने आणखी त्रास होण्याचे भय होते.

३) आणि ईमान आणणारे, त्याच्या याच जुलूम अत्याचाराच्या सवयीने भयभित होते.

४) बनी इस्राईल, फिरऔनकडून ज्या अपमान आणि अप्रतिष्ठेचे बळी होते, ह.मूसा عليه السلام च्या आल्यानंतर, याच्यांत काहीही कमी झाली नाही. म्हणून ते फारच परेशान होते. किंबहुना ह.मूसा عليه السلام ला असे पण सांगून टाकले, ''हे मूसा! ज्याप्रमाणे तुझ्या येण्याच्यापूर्वी आम्ही फिरऔन आणि त्याच्या लोकांकडून त्रासांत व्यस्त होतो, तुझ्या आल्यावर सुद्धा, आमची हीच स्थिती आहे.'' ज्यावर मूसा عليه السلام नी त्यांना सांगितले होते की, आशा आहे की, माझा पालनकर्ता लवकरच तुमच्या शत्रुला नष्ट करून टाकील, परंतु यासाठी आवश्यक आहे की, तुम्ही फक्त एका अल्लाहजवळ मदत मागा. आणि सहनशिलतेला घट्ट धरून ठेवा (कृपया पहावे सू.आअराफ आ.१२८-१२९) येथे पण मूसा عليه السلام नी त्यांना उपदेश केला की, जर तुम्ही, अल्लाहचे खरे आज्ञाधारक आहांत, तर त्याच्यावरच भरोसा करा.कारण की ईमानवाले अल्लाहवरच भरोसा करतात.

५) अल्लाहवर भरोसा करण्याबरोबरच, त्यांनी अल्लाहच्या दारी दुआ पण केल्यांत आणि खचितच् ईमानवाल्यांसाठी दुआ एक फार मोठे शस्त्र पण आहे आणि सहारा सुद्धा.

६) याचा अर्थ हा आहे की, आपल्या घरांनाच मशिदी बनवून घ्या. आणि त्यांचा रोख आपला किबला (बैतुल मुकद्दस) कडे करून घ्या, जेणेकरुन, तुम्हास उपासना करण्यासाठी बाहेर कनीसात वगैरे जाण्याची आवश्यकताच राहु नये. जेथे तुम्हास फिरऔनाच्या हस्तकांच्या जुलूम अत्याचाराचे भय रहाते.

وَقَالَ مُوْسٰى رَبَّنَآ اِنَّكَ اٰتَيْتَ فِرْعَوْنَ وَمَلَاَهٗ زِيْنَةً وَّاَمْوَالًا فِى الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۙ رَبَّنَا لِيُضِلُّوْا عَنْ سَبِيْلِكَ ۚ رَبَّنَا اطْمِسْ عَلٰٓى اَمْوَالِهِمْ وَاشْدُدْ عَلٰى قُلُوْبِهِمْ فَلَا يُؤْمِنُوْا حَتّٰى يَرَوُا الْعَذَابَ الْاَلِيْمَ ﴿٨٨﴾

आणि मूसाने विनंती केली की, हे आमच्या पालनकर्त्या! तू फिरऔन आणि त्याच्या सरदारांना दुनियेच्या आयुष्यात वैभव व तऱ्हे तऱ्हेचे माल व धन दौलत दिली आहे. हे आमच्या पालनकर्त्या! (याचसाठी दिली की) त्यांनी तुझ्या मार्गापासून (लोकांना) भटकवावे. हे आमच्या पालनकर्त्या! त्यांच्या धनसंपत्तीवर बोळा फिरव आणि तिला नाहिशी करून टाक, आणि त्यांची अंत:करणे कठीण करून टाक(१), की, यांनी ईमान आणू नये.येथे पावेतो की, दु:खदायक शिक्षेला (त्यांनी) पाहून घ्यावे(२). (८८)

قَالَ قَدْ اُجِيْبَتْ دَّعْوَتُكُمَا فَاسْتَقِيْمَا وَلَا تَتَّبِعٰٓنِّ سَبِيْلَ الَّذِيْنَ لَا يَعْلَمُوْنَ ﴿٨٩﴾

हकतआलाने फर्माविले, की तुमच्या दोघाची दुआ मान्य करून घेण्यांत आली; तर तुम्ही बळकट जमून(३) रहा; आणि त्या लोकांच्या मार्गावर चालू नका. ज्यांना ज्ञान नाही(४). (८९)

وَجٰوَزْنَا بِبَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ الْبَحْرَ فَاَتْبَعَهُمْ فِرْعَوْنُ وَجُنُوْدُهٗ بَغْيًا وَّعَدْوًا ۭ حَتّٰٓى اِذَآ اَدْرَكَهُ الْغَرَقُ ۙ قَالَ اٰمَنْتُ اَنَّهٗ لَآ اِلٰهَ اِلَّا الَّذِيْٓ اٰمَنَتْ بِهٖ بَنُوْٓا اِسْرَآءِيْلَ وَاَنَا مِنَ الْمُسْلِمِيْنَ ﴿٩٠﴾

आणि आम्ही बनी इस्राईलला समुद्रापार करून दिले(५); मग त्यांच्या मागे मागे, फिरऔन आपल्या सैन्यासह, जुलूम आणि अत्त्याचाराच्या इराद्याने चालला; येथपावेतो की, जेव्हा बुडू लागला(६), तर म्हणू लागला की, मी ईमान आणतो की, ज्यावर बनी इस्राइलने, ईमान आणले आहे, त्याच्या शिवाय की कोणी उपास्य नाही; आणि मी मुसलमानांमध्ये दाखल होत आहे. (९०)

آٰلْئٰنَ وَقَدْ عَصَيْتَ قَبْلُ وَكُنْتَ مِنَ الْمُفْسِدِيْنَ ﴿٩١﴾

( उत्तर देण्यात आले की) आता ईमान आणतो? आणि पूर्वी शिरजोरी करीत राहिला, आणि फिसाद खोरांत शामील राहिला(७). (९१)

فَالْيَوْمَ نُنَجِّيْكَ بِبَدَنِكَ لِتَكُوْنَ لِمَنْ خَلْفَكَ اٰيَةً ۭ وَاِنَّ كَثِيْرًا مِّنَ النَّاسِ عَنْ اٰيٰتِنَا لَغٰفِلُوْنَ ﴿٩٢﴾ ع

तर आज आम्ही तुझ्या प्रेताला सुटका देऊ; कारण की त्यांच्या करता धडा घेण्यास कारणीभूत व्हावे, जे तुझ्यानंतर (येणार) आहेत(८). आणि वास्तविकता ही आहे की, पुष्कळशी माणसे, आमच्या निशाण्यांकडून गाफिल आहेत (९२) १५/१४

وَلَقَدْ بَوَّاْنَا بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ مُبَوَّاَ صِدْقٍ وَّرَزَقْنٰهُمْ مِّنَ الطَّيِّبٰتِ ۚ فَمَا اخْتَلَفُوْا حَتّٰى جَاۗءَهُمُ الْعِلْمُ ۭ اِنَّ رَبَّكَ يَقْضِيْ بَيْنَهُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ فِيْمَا كَانُوْا فِيْهِ يَخْتَلِفُوْنَ ﴿٩٣﴾

आणि आम्ही बनी इस्राईलला, फार चांगले ठिकाण, राहण्यासाठी दिले. आणि आम्ही त्यांना पवित्र पदार्थ खावयास दिले. तर त्यांनी मतभेद केला नाही, येथपावेतो की, त्यांच्याजवळ ज्ञान पोहचून(९) गेले (ही) निश्चित गोष्ट आहे की, तुमचा पालनकर्ता, त्यांच्या दरम्यान, कयामतच्या दिवशी, त्या गोष्टीमध्ये फैसला करील, ज्यात ते मतभेद करीत होते. (९३)

فَاِنْ كُنْتَ فِيْ شَكٍّ مِّمَّآ اَنْزَلْنَآ اِلَيْكَ فَسْــَٔـلِ الَّذِيْنَ يَقْرَءُوْنَ الْكِتٰبَ مِنْ قَبْلِكَ ۚ لَقَدْ جَاۗءَكَ الْحَقُّ مِنْ رَّبِّكَ فَلَا تَكُوْنَنَّ مِنَ الْمُمْتَرِيْنَ ﴿٩٤﴾

मग जर तुम्ही, याच्याकडून संशयात असाल, ज्याला आम्ही तुमच्याकडे पाठविले आहे, तर तुम्ही त्या लोकांना विचारून घ्या, जे आपल्या पूर्वीच्या पुस्तकांना वाचत असतात;नि:संशय, तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याकडून सत्य पुस्तक आले आहे. तुम्ही कधीच शंका घेणाऱ्यांमधून होऊ नका(१०). (९४)

وَلَا تَكُوْنَنَّ مِنَ الَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِ اللّٰهِ فَتَكُوْنَ مِنَ الْخٰسِرِيْنَ ﴿٩٥﴾

आणि न त्या लोकांमधून व्हा, ज्यांनी अल्लाहच्या निशाण्यांना नाकारले; कोठे आपण तोटा उचलणाऱ्यांमध्ये न होऊन जावे(११). (९५)

१) जेव्हा ह.मूसा عليه السلام नी पाहिले की, फिरऔन आणि त्याच्या लोकांवर हितोपदेशाचा पण काही परिणाम झाला नाही आणि अशा प्रकारे चमत्कार पाहून सुद्धा त्यांच्यात काही बदल झाला नाही. तर मग त्यांच्यासाठी शापाची प्रार्थना केली. जिला अल्लाहने येथे उद्घृत केले आहे.

२) म्हणजे यांनी जरी ईमान आणले,तरी शिक्षा पाहून घेतल्यावर आणावे. जे यांच्याकरीता फायदेकारक होणार नाही. येथे मनांत ही शंका यावयास नको की, पैगंबर तर हिदायतची दुआ करतात, न की, नष्ट होण्याची बद्दुआ. यासाठी की, दावत व तबलीग (आवाहन आणि प्रचार) आणि प्रत्येक प्रकारच्या तर्कवितर्कानंतर, जेव्हा हे स्पष्ट होऊन जाईल, की

आता ईमान आणण्याची काही आशा शिल्लक राहिलेली नाही, तर मग शेवटचा उपाय हाच राहून जातो की, या लोकांच्या मामल्याला अल्लाहच्या हवाली करून देण्यात यावे. ही जणू अल्लाहची मर्जीच असते, जी आपोआप पैगंबराच्या जिभेने बाहेर पडते. ज्याप्रमाणे ह.नूह. ﷺ नी पण, साडे नऊशे वर्षे प्रचार केल्यानंतर, सरशेवटी आपल्या लोकांकरीता बद्दुआ केली; ''हे पालनकर्त्या! जमिनीवर एका काफिराला सुद्धा, वसलेला राहू देऊ नकोस!'' (सू. नूह – २६) यामुळे की जर तू यांना सोडले तर ते तूझ्या बंदयांना भटकवून टाकतील आणी त्यांच्यामार्फत निर्माण होणारा वंश काफिर आणि फाजिर (गुन्हेगार)होतील.

३) याचा एक अर्थ तर हा आहे की, आपल्या बद्दुआ वर कायम तुमची दुआ तर नक्कीच मान्य करून घेण्यात आली आहे, परंतु आम्ही तिला केव्हा कार्यान्वित करूं? हे केवळ आमच्या मर्जी आणि प्रयोजनांवर अवलंबून आहे. अलबत्ता असे म्हणतात की, या बद्दुआच्या चाळीस वर्षांनंतर, फिरऔन आणि त्याचे लोक नष्ट करण्यात आले. आणि बद्दुआ प्रमाणे फिरऔन जेव्हा बुडू लागला तर त्यावेळी त्याने ईमान आणल्याची घोषणा केली. ज्याचा काही उपयोग झाला नाही. दुसरा अर्थ याचा हा आहे की, तुम्ही आपली तबलीग आणि दावत, बनी इसराईलची हिदायत आणि मार्गदर्शन, आणि त्यांना फिरऔनाच्या दास्यातून मुक्त करण्याची पराकाष्ठा, चालू ठेवा.

४) म्हणजे जे लोक अल्लाहची सवय, त्याचे कायदे, आणि त्याचे प्रयोजन आणि युक्तीला मानत नाही, तुम्ही त्यांच्यासारखे होऊ नका किंबहुना आता प्रतिक्षा आणि सहन करा; अल्लाहतआला आपल्या प्रयोजन आणि बुद्धीप्रमाणे लवकर किंवा उशीराने आपला वायदा, जरूर पुरा करीन. कारण की तो वायद्याच्या विरूद्ध करीत नसतो.

५) म्हणजे समुद्राला फाडून, त्याच्यांत कोरडा रस्ता बनवून दिला. (ज्याप्रमाणे सू.बकर: आ.५० मध्ये येऊन चुकले आणि आणखी तपशील सू.शुअरामध्ये येईल) आणि तुम्हास एका किनाऱ्यावरून, दुसऱ्या किनाऱ्यावर पोहचवून दिले.

६) म्हणजे अल्लाहच्या आज्ञेने, चमत्कारीत पद्धतीने बनलेल्या कोरड्या रस्त्यावर, ज्यावर चालून ह.मूसा ﷺ आणि त्यांच्या लोकांनी समुद्र पार केला होता, फिरऔन आणि त्यांचे सैन्य सुद्धा, समुद्र पार करण्याच्या उद्देशाने चालणे सुरू होऊन गेले. उद्देश्य हा होता की, ह.मूसा ﷺ बनी इस्राईलला जे फिरऔनच्या दास्यातून मुक्त करण्यासाठी रातोरात, घेऊन आला तर त्याला दुसऱ्यादा दास्याच्या कैदेत आणले जावे. जेव्हा फिरऔन आणि त्याचे सैन्य याच सामुद्रिक रस्त्यावर दाखल होऊन गेले, तेव्हा अल्लाहने समुद्राला, पूर्वी सारखे होऊन जाण्याचा हुकूम देऊन टाकला. परिणामी फिरऔनसह सर्वच्या सर्व समुद्रांत बुडून गेले.

७) अल्लाहकडून उत्तर देण्यात आले की, आता ईमान आणण्याचा काही फायदा नाही; कारण की, जेव्हा ईमान आणण्याचा वेळ होता, तेव्हा तू आज्ञाभंजनात आणि फसादखोरीत व्यस्त होता. एका हदीशीत येते की, ह.जिब्रईल ﷺ नी नबी ﷺ ला सांगितले की, ज्यावेळी फिरऔन बुडतांना, ईमान जाहीर करत होता, तेव्हा मी समुद्रांतून चिखल घेऊन, त्याच्या तोंडात टाकत होतो. कारण की त्याने लाइलाहा इल्लल्लाह म्हणू न शकावे. मला भय होते की, या कलम्यामुळे अल्लाहतआलाने त्याला दयेला पात्र न ठरवून टाकावे. (मुसनद अहमद पृ.३०१, तिर्मिझी क्र.३१०७, तफसीर सू.यूनुस)

८) जेव्हा फिरऔन बुडून गेला, तेव्हा त्याच्या मृत्युचा पुष्कळशा लोकांना विश्वास वाटत नव्हता. अल्लाहतआलाने समुद्राला आज्ञा दिली; त्याने त्याच्या प्रेताला कोरड्या जमिनीवर फेकून दिले; ज्याला मग सर्वांनी प्रत्यक्षांत पाहिले. प्रसिद्ध आहे की, आजसुद्धा, हे शव इजिप्तच्या म्युझिअममध्ये सुरक्षित आहे.

९) म्हणजे एक तर अल्लाहचे आभार मानण्याऐवजी, आपसांत मतभेद सुरू करून दिला; मग हा मतभेद सुद्धा, अज्ञान आणि अडाणीपणामुळे केला नाही; किंबहुना ज्ञान आल्यानंतर केला. ज्याचा स्पष्ट अर्थ हा आहे की, हा मतभेद निव्वळ शत्रूत्व आणि अहंकारावर आधारित होता.

१०) हे संबोधन एक तर तमाम मानवांसाठी आहे, नाही तर नबी ﷺ च्या मार्फत, उम्मतला शिक्षण दिले जात आहे. कारण की, नबी ﷺ ला तर, वह्यच्या बाबतीत काही शंका असूच शकत नव्हती. ''जे पुस्तक वाचतात, त्यांना विचारून घ्या.'' चा अर्थ आहे की, कुरआन मजीदच्या पूर्वीचे आकाशी ग्रंथ (तौरात व इंजील वगैरे) म्हणजे ज्यांचे जवळ ही पुस्तके आढळून येतात; यांच्याकडून या पुस्तकांच्या बाबतीत माहित करून घ्यावे, कारण की त्यांच्यात याच्या (कुरआनाच्या) निशाण्या, आणि शेवटच्या पैगंबराची वैशिष्ट्ये, वर्णन करण्यांत आली आहेत.

११) हे पण खरे पाहू जाता, उम्मतला संबोधण्यात येत आहे की, खोटे ठरविण्याचा रस्ता, घाट्याचा आणि बर्बादीचा रस्ता आहे.

إِنَّ ٱلَّذِينَ حَقَّتْ عَلَيْهِمْ كَلِمَتُ رَبِّكَ لَا يُؤْمِنُونَ ﴿٩٦﴾

खचित्च, ज्या लोकांच्या बाबतीत, तुमच्या पालनकर्त्याची गोष्ट सिद्ध होऊन चुकली आहे, ते ईमान आणणार नाहीत. (९६)

وَلَوْ جَآءَتْهُمْ كُلُّ ءَايَةٍ حَتَّىٰ يَرَوُا۟ ٱلْعَذَابَ ٱلْأَلِيمَ ﴿٩٧﴾

जरी त्यांच्या जवळ सर्व प्रमाणे पोहचून जातील, जोपर्यंत की ते, दु:खदायक शिक्षेला पाहून न घेतील[१] (९७)

فَلَوْلَا كَانَتْ قَرْيَةٌ ءَامَنَتْ فَنَفَعَهَآ إِيمَٰنُهَآ إِلَّا قَوْمَ يُونُسَ لَمَّآ ءَامَنُوا۟ كَشَفْنَا عَنْهُمْ عَذَابَ ٱلْخِزْىِ فِى ٱلْحَيَوٰةِ ٱلدُّنْيَا وَمَتَّعْنَٰهُمْ إِلَىٰ حِينٍ ﴿٩٨﴾

अलबत्ता कोण्या वस्तीने ईमान आणले नाही, की ईमान आणणे त्यांना फायदेकारक झाले असते, यूनुसच्या लोकांशिवाय[२]. जेव्हा त्यांनी ईमान आणले, तेव्हाआम्ही फजितीच्या शिक्षेला ऐहिक जीवनांत त्यांच्यापासून टाळून टाकले; आणि त्यांना एका विशिष्ट वेळेपर्यंत सुखोपभोग घेऊ दिला[३]. (९८)

وَلَوْ شَآءَ رَبُّكَ لَءَامَنَ مَن فِى ٱلْأَرْضِ كُلُّهُمْ جَمِيعًا أَفَأَنتَ تُكْرِهُ ٱلنَّاسَ حَتَّىٰ يَكُونُوا۟ مُؤْمِنِينَ ﴿٩٩﴾

आणि जर तुमचा पालनकर्ता इच्छिता, संपूर्ण जमिनीवरील सर्वच्या सर्व लोक, ईमान घेऊन आले असते[४]; तर काय तुम्ही लोकांवर जबरदस्ती करू शकता की, त्यांनी ईमानच आणावे ? (९९)

وَمَا كَانَ لِنَفْسٍ أَن تُؤْمِنَ إِلَّا بِإِذْنِ ٱللَّهِ وَيَجْعَلُ ٱلرِّجْسَ عَلَى ٱلَّذِينَ لَا يَعْقِلُونَ ﴿١٠٠﴾

वास्तविक कोण्या माणसाचे ईमान आणणे, अल्लाहच्या हुकूमावाचून शक्य नाही. आणि अल्लाहतआला मूर्ख लोकांवर घाण टाकून देतो[५] (१००)

قُلِ ٱنظُرُوا۟ مَاذَا فِى ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلْأَرْضِ وَمَا تُغْنِى ٱلْءَايَٰتُ وَٱلنُّذُرُ عَن قَوْمٍ لَّا يُؤْمِنُونَ ﴿١٠١﴾

आपण सांगून टाका की, तुम्ही विचार करा की, कोण कोणत्या वस्तू आकाशामध्ये आणि जमिनीमध्ये आहेत; आणि जे लोक ईमान आणत नाहीत, त्यांना प्रमाणे आणि धमकावण्या काही नफा पोहोचवत नाही. (१०१)

فَهَلْ يَنتَظِرُونَ إِلَّا مِثْلَ أَيَّامِ ٱلَّذِينَ خَلَوْا۟ مِن قَبْلِهِمْ قُلْ فَٱنتَظِرُوٓا۟ إِنِّى مَعَكُم مِّنَ ٱلْمُنتَظِرِينَ ﴿١٠٢﴾

तर ते लोक फक्त, त्या लोकांच्या सारख्या घटनांची प्रतिक्षा करीत आहेत, जे याच्यापूर्वी होऊन चुकले आहेत? आपण सांगून टाका की, बरे तर तुम्ही वाट पहा. मी पण तुमच्याबरोबर वाट पाहणाऱ्यांमधून आहे[६]. (१०२)

ثُمَّ نُنَجِّى رُسُلَنَا وَٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ كَذَٰلِكَ حَقًّا عَلَيْنَا نُنجِ ٱلْمُؤْمِنِينَ ﴿١٠٣﴾

मग आम्ही आमच्या पैगंबरांना, आणि त्या ईमानवाल्यांना वाचवून घेत असत; आमच्यावर अतीवार्य आहे कि आम्ही अशाचप्रकारे सर्व ईमानवाल्यांना सुटका देत असतो, ही आमची जबाबदारी आहे. (१०३)

قُلْ يَٰٓأَيُّهَا ٱلنَّاسُ إِن كُنتُمْ فِى شَكٍّ مِّن دِينِى فَلَآ أَعْبُدُ ٱلَّذِينَ تَعْبُدُونَ مِن دُونِ ٱللَّهِ وَلَٰكِنْ أَعْبُدُ ٱللَّهَ ٱلَّذِى يَتَوَفَّىٰكُمْ وَأُمِرْتُ أَنْ أَكُونَ مِنَ ٱلْمُؤْمِنِينَ ﴿١٠٤﴾

आपण सांगून टाका की[७], हे लोकांनो! जर तुम्ही माझ्या धर्माकडून शंकेत असाल, तर मी त्या उपास्यांची भक्ती करत नाही, ज्यांची तुम्ही, अल्लाहला सोडून, भक्ती करतात[८]; परंतु, होय! त्या अल्लाहची भक्ती करतो, जो तुमचे प्राण हरण करतो[९]. आणि मला हा हुकूम झाला आहे की, मी ईमान आणणाऱ्यांमधून व्हावे; (१०४)

وَأَنْ أَقِمْ وَجْهَكَ لِلدِّينِ حَنِيفًا وَلَا تَكُونَنَّ مِنَ ٱلْمُشْرِكِينَ ﴿١٠٥﴾

आणि हे की, आपली तोंडे एकनिष्ठ होऊन (हया) धर्माकडे करून घ्यावे; आणि कधी 'मुशरिक' होऊ नये[१०]. (१०५)

१) हे तेच लोक आहेत, जे कुफ्र आणि अल्लाहच्या अपराधात, इतके बुडून गेलेले असतात की, कोणी सद्‌उपदेश त्यांच्यावर काही परिणाम करीत नाही; आणि कोणी प्रमाण त्यांच्या करता सिद्ध होत नाही. यासाठी की, आज्ञाभंग करून करून, सत्त्याला मान्य करण्याच्या प्राकृतिक क्षमतेला, त्यांनी संपवून टाकलेले असते. त्यांचे डोळे जर उघडतात, तर अशा वेळी जेव्हा अल्लाहची शिक्षा त्यांच्या शिरावर येऊन पोहचते; तेव्हा ते ईमान अल्लाहच्या दरबारी कबूल होत नाही. ''जेव्हा त्यांनी आमची शिक्षा पाहून घेतली. (त्यावेळी) त्यांच्या ईमानाने त्यांना काही फायदा दिला नाही.'' (सू.मोमिन ८५)

२) म्हणजे ज्या वस्त्यांना आम्ही नष्ट करून टाकले, त्यांच्या कोणी एक वस्तीपण अशी का झाली नाही, जिने असे ईमान

आणले असते, जे तिच्यासाठी फायदेकारक झाले असते. होय! परंतु ,फक्त यूनुसचे लोक असे झाले आहेत की, जेव्हा त्यांनी ईमान आणले, तेव्हा अल्लाहने त्यांच्यावरून शिक्षा दूर करून टाकली. याची थोडक्यांत पार्श्वभूमी अशी आहे की, ह.यूनुस عليه السلام नी जेव्हा पाहिले, त्यांच्या तबलीग आणि दावतने त्यांच्या लोकांवर काही परिणाम होत नाही, तेव्हा त्यांनी आपल्या लोकांत घोषणा करून टाकली की, अमक्या अमक्या दिवशी तुमच्यावर शिक्षा येऊंन पोहचेल, आणि स्वत: तेथून निघून गेले. जेव्हा शिक्षा त्यांच्यावर ढगाप्रमाणे उमळून आली, तेव्हा मुले, स्त्रिया, येथपावेतो की, जनावरांसह ते एका मैदानात जमा झाले, आणि अल्लाहच्या दरबारांत, रडणे भेकणे आणि माफी व क्षमेची याचना सुरू करून दिली. अल्लाहने त्यांचा पश्चात्ताप मान्य करून, त्यांच्यावरून शिक्षा टाळून दिली. ह.यूनुस عليه السلام येणाऱ्या जाणाऱ्या प्रवाशांकडून आपल्या लोकांची स्थिती माहित करून घेत असत. त्यांना जेव्हा ठाऊक झाले की, अल्लाहतआलाने त्यांच्या लोकांवरून शिक्षा टाळून दिली आहे, तेव्हा त्यांनी आपण खोटे ठरल्यामुळे त्या लोकांत जाणे पसंत केले नाही. किंबहुना त्यांच्याशी नाराज होऊन, ते कोण्या दुसरीकडे रवाना झाले, ज्यावर ती नावेची घटना घडली. (ज्याचा तपशील आपल्या स्थानावर येईल.) (फत्हुल कदीर) तथापि भाष्यकारांमध्ये, या घटनेत मतभेद आहे की, यूनुसच्या लोकांनी ईमान केव्हा आणले? शिक्षा पाहून आणले, जेव्हा ईमान आणणे फायदेकारक होत नाही. परंतु अल्लाहतआलाने याला आपल्या या कायद्याला अपवाद करुन त्यांच्या ईमानला कुबल करून घेतले. किंवा अजून शिक्षा येवून पोहोचली नव्हती म्हणजे ती घटका आली नव्हती की, जेव्हा ईमान फायदेकारक होत नसते. किंबहुना ती घटका येण्याच्या पूर्वीच लक्षणे बघून, त्यांनी तौबा करून घेतली; आणि अल्लाहतआलाने प्रत्येक तौबा करणाऱ्याच्या तौबा प्रमाणे, त्यांची तौबा पण कबूल करून घेतली. अशाप्रकारे ह.यूनुस عليه السلام च्या लोकांचे काही खास वैशिष्टय आढळून येत नाही.

३) कुरआनाने ऐहिक शिक्षेच्या दूर करण्याचा खुलासा तर केला आहे, परलोकातील शिक्षेबाबत काही खुलासा केला नाही; म्हणून काही भाष्यकारांच्या मते, पारलौकीक शिक्षा त्यांच्याकडून संपवून टाकली नाही. परंतु जेव्हा कुरआनाने हा खुलासा करून दिला की ऐहिक शिक्षा ईमान आणल्यामुळे टाळली गेली होती, तर मग पारलौकीक शिक्षेच्या बाबत, खुलासा करण्याची आवश्यकताच रहात नाही; कारण की पारलौकीक शिक्षेचा फैसला तर ईमान आणि ईमान नसणे,याच्याच आधारावर होणे आहे. जर ईमान आणल्यानंतर, यूनुसचे लोक, आपल्या ईमानावावर कायम राहिले असतील, (ज्याचा खुलासा येथे नाही) तर खचित्‌च ते पारलौकीक शिक्षेपासून पण ते सुरक्षित राहतील. तथापि अन्य स्वरूपांत, शिक्षेपासून सुरक्षितता फक्त इहलोकाच्या मर्यादेपर्यंतच राहील. वल्लाह्‌ अअ्लम्‌.

४) परंतु अल्लाहने असे इच्छिले नाही; कारण की हे त्याच्या त्या प्रयोजन आणि बुद्धी च्या विरुद्ध आहे, ज्याला पूर्णपणे तोच जाणतो. हे यासाठी सांगितले की, नबी करीम ﷺ ची तिव्र इच्छा रहावयाची की सर्वांनी मुसलमान होऊन जावे; अल्लाहतआलाने फर्माविले, असे होऊ शकत नाही. कारण की, अल्लाहची मर्जी नव्हती; म्हणून पुढे सांगितले की, तुम्ही लोकांना जबरदस्तीने ईमान आणण्यास भाग पाडू शकतात? जेव्हा की न याची आपणास शक्ती आहे. न त्याचे आपण जबाबदार आहात.

५) घाणीने अभिप्रेत शिक्षा किंवा कुफ्र आहे. म्हणजे जे लोक अल्लाहच्या निशाण्यांवर चिंतन करीत नाहीत, ते कुफ्रमध्येच व्यस्त राहतात. आणि अशाप्रकारे शिक्षेला पात्र ठरविले जातात.

६) म्हणजे हे लोक, ज्यांच्यावर काही प्रमाण आणि धमकी, परिणामकारक होत नाही, म्हणून ईमान आणत नाही. काय या गोष्टीची वाट पहात आहेत की, त्याच इतिहासाची पुनरावृत्ती केली जावी. ज्याने मागचे लोकसमूह पार होऊन चुकले आहेत. म्हणजे ईमानवाल्यांना वांचवून (जसा की पुढील म्हावाक्यांत खुलासा आहे.) बाकी सर्वांना नष्ट करून टाकण्यात येत होते. जर या गोष्टीची प्रतिक्षा आहे तर ठिक आहे तुम्हीही प्रतिक्षा करा, मी पण तुमच्याबरोबर प्रतिक्षा करीत आहे.

७) या महावाक्यात अल्लाहतआला आपले शेवटचे पैगंबर ह.मुहम्मद रसूलुल्लाह ﷺ ला आज्ञा करीत आहे की, तुम्ही सर्व लोकांवर हे स्पष्ट करून टाका की, माझी पद्धती आणि मुशरिकांची पद्धती, एक दुसऱ्यापासून भिन्न आहे.

८) म्हणजे जर तुम्ही माझ्या धर्माबद्दल शंका घेत असाल, ज्यात फक्त एका अल्लाहची भक्ती आहे आणि हाच सत्यधर्म आहे; न की कोणी दुसरा. तर लक्षात ठेवा की मी या उपास्यांची कधीही, आणि कोणत्याही स्थितीत, भक्ती करणार नाही; ज्यांची तुम्ही करीत आहात.

९) म्हणजे मृत्यू आणि जीवन, त्याच्याच हातात आहे; म्हणूनच जेव्हा तो इच्छेल, तुम्हास नष्ट करू शकतो कारण की, माणसांचे प्राण त्याच्याच हातात आहेत.

१०) 'हनीफ' चा अर्थ आहे, एकाग्र म्हणजे प्रत्येक धर्माला सोडून, फक्त इस्लाम धर्माला आत्मसात करावे; आणि सर्व बाजूंनी तोंड फिरवून फक्त एका अल्लाहकडे एकाग्रतेने वळावे.

وَلَا تَدْعُ مِنْ دُونِ اللّٰهِ مَا لَا يَنْفَعُكَ وَلَا يَضُرُّكَ ۚ فَإِنْ فَعَلْتَ فَإِنَّكَ إِذًا مِّنَ الظّٰلِمِينَ ﴿١٠٦﴾

**आणि अल्लाहला सोडून, अशा वस्तूची भक्ती करू नये, जी तुला न काही नफा पोहचवू शकेल, न काही नुकसान पोहचवू शकेल. मग जर असे केले, तर तू अशा स्थितीत, जालिमां मधून होऊन जाशील[१] (१०६)**

وَإِنْ يَّمْسَسْكَ اللّٰهُ بِضُرٍّ فَلَا كَاشِفَ لَهٗٓ إِلَّا هُوَ ۚ وَإِنْ يُّرِدْكَ بِخَيْرٍ فَلَا رَآدَّ لِفَضْلِهٖ ۚ يُصِيبُ بِهٖ مَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ ۚ وَهُوَ الْغَفُورُ الرَّحِيمُ ﴿١٠٧﴾

**आणि जर अल्लाह् तुम्हास काही दु:ख पोहोचवेल, तर त्याच्याशिवाय अन्य कोणी,त्याला दूर करणारा नाही. आणि जर तो तुम्हास काही हित पोहचवू इच्छेल, तर त्याच्या औदार्यास कोणी हटविणारा नाही[२]. तो आपले औदार्य, आपल्या सेवकांमधून ज्यांच्यावर इच्छेल, त्यांना देऊन टाकेन. आणि तो मोठा क्षमाकर्ता आणि मोठा दयाळू आहे. (१०७)**

قُلْ يٰٓأَيُّهَا النَّاسُ قَدْ جَآءَكُمُ الْحَقُّ مِنْ رَّبِّكُمْ ۚ فَمَنِ اهْتَدٰى فَإِنَّمَا يَهْتَدِي لِنَفْسِهٖ ۚ وَمَنْ ضَلَّ فَإِنَّمَا يَضِلُّ عَلَيْهَا ۚ وَمَآ أَنَا عَلَيْكُمْ بِوَكِيلٍ ﴿١٠٨﴾

**आपण सांगून टाका की, अहो लोकांनो! तुमच्या जवळ सत्य, तुमच्या पालनकर्त्याकडून येऊन चुकले आहे[३]. यासाठी जो मनुष्य, सरळ मार्गावर येऊन जाईल, तर तो आपल्याचसाठी सरळ मार्गावर येईल[४]; आणि जो मनुष्य मार्गभ्रष्ट राहील तर त्याचे मार्गावरुन भटकणे त्याच्यावरच पडेल. आणि[५] मी तुमच्यावर, काही (पहारेकरी) तर म्हणून नेमलेला नाही[६]. (१०८)**

وَاتَّبِعْ مَا يُوحٰٓى إِلَيْكَ وَاصْبِرْ حَتّٰى يَحْكُمَ اللّٰهُ ۚ وَهُوَ خَيْرُ الْحٰكِمِينَ ﴿١٠٩﴾

**आणि आपण त्याचे अनुकरण करत रहा, जे काही आपल्याकडे 'वह्य' केले जाते आणि सहनशिलता पत्करा[७]; येथपावेतो की, अल्लाह फैसला करून टाकीन, आणि तो सर्व फैसला करणाऱ्यांमध्ये उत्तम आहे[८]. (१०९)**

(११ / ६ / १६)

سُورَةُ هُودٍ مَكِّيَّةٌ (١١) (٥٢) آياتها ١٢٣ ركوعاتها ١٠

## (११) सू. हूद

महावाक्ये १२३ | रुकूअ १०

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيمِ

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

الٓرٰ ۚ كِتٰبٌ أُحْكِمَتْ آيٰتُهٗ ثُمَّ فُصِّلَتْ مِنْ لَّدُنْ حَكِيمٍ خَبِيرٍ ﴿١﴾

**अलीफ-लाम-रा, हे एक असे पुस्तक आहे की, त्याची महावाक्ये, भक्कम केली गेली आहेत[९]; मग (खूप) स्पष्ट स्पष्ट वर्णन केली गेली आहेत[१०], एका बुद्धीमान आणि ज्ञानी (अल्लाह) कडून[११] (१)**

أَلَّا تَعْبُدُوٓا إِلَّا اللّٰهَ ۚ إِنَّنِي لَكُمْ مِّنْهُ نَذِيرٌ وَّبَشِيرٌ ﴿٢﴾

**हे की, अल्लाहच्या शिवाय कोणाची उपासना करू नका; मी तुम्हास अल्लाहकडून भिवविणारा आणि शुभवर्तमान देणारा आहे (२)**

१) म्हणजे जर अल्लाहला सोडून, अशा उपास्यांचा तुम्ही धांवा कराल, जे कोणाला नफा आणि नुकसान पोहचविण्याला समर्थ नाहीत, तर हे जुलूम केल्यासारखे होईल. जुलुमाचा अर्थ आहे, कोण्या गोष्टीला त्याच्या मूळ ठिकाणावरून हलवून, कोणी दुसऱ्या जागी ठेवून देणे. उपासना, कारण की, फक्त त्या अल्लाहचा हक्क आहे ज्याने संपूर्ण विश्व बनविले आहे; आणि संपूर्ण जीवनाची साधनसामुग्री पण तोच पुरवत असतो; तर या उपासनेला पात्र व्यक्तीत्वाला सोडून, आणखी कोणाची उपासना करणे, जणू उपासनेचा फारच चुकीचा उपयोग आहे. यासाठीच 'शिर्कला 'मोठा जुलूम' म्हणून संबोधण्यात आले आहे. येथे पण संबोधन जरी, नबी ﷺ ला केले गेले आहे; परंतु खरे संबोधित, प्रत्येक मनुष्य, व उम्मते मुहम्मदिया हे आहेत.

२) भलाईला येथे औदार्याने, यासाठी संबोधन्यात आले की, अल्लाहतआला आपल्या सेवकांबरोबर, जो भलाईचा मामला करतो, कर्मांच्या अनुषंगाने जरी सेवक याला पात्र नाहीत, परंतु हे निव्वळ त्याचे औदार्य आहे की, तो कर्माकडे दुर्लक्ष करून, मानवांवर सुद्धा दया आणि कृपा करीत असतो.

३) सत्त्याने अभिप्रेत कुरआन आणि इस्लामधर्म आहे. ज्यांत एकेश्वरवाद, आणि ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणणे अत्यंत आवश्यक आहे.

४) म्हणजे याचा फायदा त्यालाच होईल की, कयामतच्या दिवशी अल्लाहच्या शिक्षेपासून वाचून जाईल.
५) म्हणजे याचे नुकसान आणि ओझे त्याच्यावरच पडेल की कयामतच्या दिवशी नरकाग्नीत जळेल. जणू कोणी हिदायतचा मार्ग अनुसरेन, तर याच्याने अल्लाहच्या शक्तीत काही वाढ होऊन जाणार नाही. आणि जर कोणी कुफ्र आणि मार्गभ्रष्टतेला अंगीकारेल, तर याच्याने अल्लाहच्या सत्ता आणि सामर्थ्यात काहीही फरक पडणार नाही. जणू ईमान आणि हिदायत (अंगीकारण्या) ला प्रोत्साहन आणि कुफ्र आणि मार्गभ्रष्टतेपासून वाचण्याची ताकीद दोघांचा उद्देश्य, मानवांचीच भलाई आणि चांगले इच्छिणे आहे; अल्लाहला याची काही गरज नाही.
६) म्हणजे ही जबाबदारी मला सोपविण्यांत आली नाही की, मी कुठल्याही प्रकारे, तुम्हाला मुसलमान बनवून सोडावे किंबहुना मी तर फकत खुषखबर देणारा व भिवविणारा आणि प्रचारक व आवाहक आहे. माझे काम फक्त ईमानवाल्यांना शुभवर्तमान देणे, आणि आज्ञाभंजकांना अल्लाहची शिक्षा, आणि त्याच्या पकडीपासून भिवविणे, आणि अल्लाहच्या संदेशाचे आवाहन आणि प्रचार करणे आहे. कोणी या आवाहनाला मानून ईमान आणतो, तर ठीक आहे; कोणी मानत नाही, तर मी या गोष्टीला जबाबदार नाही की त्याला, जबरदस्तीने मानण्यांस भाग पाडावे.
७) अल्लाहतआला ज्या गोष्टीचे 'वह्य' करेल, त्याला घट्ट धरून ठेवावे; ज्याचा हुकूम करील, त्यावर अंमलबजावणी करावी.ज्यापासून मना करेल, ते न करावे. आणि कुठल्याही गोष्टीत कुचराई करू नये. आणि वह्यच्या अनुकरणांत आणि आज्ञापालनांत जो त्रास होईल, विरोधकांकडून जी इजा पोहोचवली जाईल, आणि तबलीग व दावतच्या मार्गात, ज्या कठीण समस्यांतून पार पडावे लागेल, त्यावर सहनशिलता पत्करावी; आणि दृढ निश्चयाने सर्वांना तोंड द्यावे.
८) कारण की याचे ज्ञानपण परिपूर्ण आहे. त्याचे सामर्थ्य आणि शक्तीपण विशाल आहे; आणि त्याची दयापण सर्वांसाठी आहे. म्हणून त्याच्यापेक्षा जास्त उत्तम निर्णय करणारा, आणखी कोण असूंशकतो ?
९) सू.हूद : या अध्यायांत पण त्या लोकसमूहांची चर्चा आहे, जे अल्लाहच्या निशाण्यांना आणि पैगंबरांना नाकारून, अल्लाहच्या शिक्षेला बळी पडले. आणि इतिहासाच्या पृष्ठावरून, एक तर चुकीच्या शब्दासारखे मिटून गेले, किंवा इतिहासाच्या पृष्ठांवर, धडा घेण्यासारखे म्हणून बनून उपस्थित आहे. याच्यासाठी हदीसमध्ये येते की, ह.अबुबकर सिद्दीक ﷺ नी रसूलुल्ला ﷺ ला अर्ज केला की, काय गोष्ट आहे की, आपण वृद्धासारखे दिसत आहांत ? तेव्हा आपण ﷺ. नी फर्मावले, मला सू.हूद. सू.वाकेआ, सू.अम्म यतसा अलून, आणि सू. तकवीर वगैरेनी म्हातारा करून टाकले आहे.'' (तिर्मिझी क्र.३२१७ सहीह तिर्मिझी अलबानी ११३-३) म्हणजे शब्द आणि काव्याच्या अनुषंगाने, इतकी सिद्ध आणि पक्की आहे की, त्यांचा क्रम आणि अर्थांत काही व्यत्यय नाही.
१०) मग याच्यांत आदेश व धर्मशास्त्र, आघात आणि गोष्टी, श्रद्धा आणि ईमान, आणि शिष्टाचार व चारित्र्य, ज्याप्रमाणे खुलासेवार आणि तपशिलाने वर्णन केले गेले आहेत, मागील पुस्तके, याचा नमुना सादर करण्याला असमर्थ आहेत.
११) म्हणजे आपल्या प्रतिपादनांत बुद्धीवान आहे. म्हणून याच्याकडून अवतरीत केलेल्या गोष्टी, प्रयोजनाने खाली नाही. आणि तो खबर देणारापण आहे. म्हणजे संपूर्ण मामले, आणि त्याचे परिणाम, त्याला ठाऊक आहे. म्हणून त्याच्या गोष्टीवर अंमलबजावणी केल्यानेच, मनुष्य वाईट परिणामापासून वाचू शकतो.

وَّاَنِ اسْتَغْفِرُوْا رَبَّكُمْ ثُمَّ تُوْبُوْٓا اِلَيْهِ يُمَتِّعْكُمْ مَّتَاعًا حَسَنًا اِلٰٓى اَجَلٍ مُّسَمًّى وَّيُؤْتِ كُلَّ ذِيْ فَضْلٍ فَضْلَهٗ ۭ وَاِنْ تَوَلَّوْا فَاِنِّىْٓ اَخَافُ عَلَيْكُمْ عَذَابَ يَوْمٍ كَبِيْرٍ ۝٣

**आणि हे की तुम्ही आपले अपराध, आपल्या पालनकर्त्याकडून माफ करून घ्या, मग त्याच्या कडे (च) वळा; तो तुम्हास (एका) निश्चित केलेल्या वेळे पर्यंत,[१] सुखोपभोग घेऊ देईल. आणि प्रत्येक जास्त कर्म करणाऱ्यांस जास्त प्रतिफळ देईल. आणि जर तुम्ही त्याच्याकडून तोंड फिरवत रहाल, तर मला तुमच्या करता, एका मोठ्या दिवसाच्या[२] शिक्षेचे भय आहे. ३**

اِلَى اللّٰهِ مَرْجِعُكُمْ ۚ وَهُوَ عَلٰي كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ۝٤

**तुम्हास, अल्लाहजवळच (परत) जाणे आहे; आणि तो प्रत्येक वस्तूवर पूर्ण सामर्थ्य बाळगतो ४**

اَلَآ اِنَّهُمْ يَثْنُوْنَ صُدُوْرَهُمْ لِيَسْتَخْفُوْا مِنْهُ ۭ اَلَا حِيْنَ يَسْتَغْشُوْنَ ثِيَابَهُمْ ۙ يَعْلَمُ مَا يُسِرُّوْنَ وَمَا يُعْلِنُوْنَ ۚ اِنَّهٗ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ۝٥

**लक्षांत ठेवा! हे लोक आपल्या उरांस दुमटे करून घेतात; कारण की आपल्या गोष्टी अल्लाहकडून लपवू शकतील[३]. लक्षात ठेवा! जेव्हा हे लोक आपले कपडे पांघरून घेतात तो त्यावेळी पण सर्व काही जाणतो! जे ते काही लपवतात आणि जे काही ते जाहीर करतात. खचित्‌च तो मनातील गुप्त भेद जाणतो ५**

१) येथे त्या ऐहिक साधन सामुग्रीला, जिला कुरआनाने, सर्व साधारणपणे 'मता-ए-गुरूर' धोक्याचा सामान, म्हटले आहे. येथे त्याल मता-ए-हसन ठरविण्यांत आले आहे. याचा अर्थ हा झाला की,जो परलोकाकडून गाफील होऊन, ऐहिक साधन सामुग्री कडून लाभ उचलेल, त्याच्यासाठी हा धोक्याचा सामान आहे; कारण की याच्यानंतर त्याला वाईट परिणाम भोगावा लागणार आहे. आणि जो परलोकाच्या तयारीच्या बरोबर बरोबर, याच्यापासून फायदा उचलेल, त्याच्यासाठी ही थोड्या दिवसाची जीवनाची साधन सामुग्री, भलाईचा सामान आहे. कारण की, त्याने त्याला अल्लाहच्या आदेशांप्रमाणे वापरले आहे.

२) मोठ्या दिवसाने अभिप्रेत कयामतचा दिवस आहे.

३) याच्या अवतरणाच्या कारणांत भाष्यकारांमध्ये मतभेद आहे; म्हणूनच याच्या भावार्थामध्येही मतभेद आहेत. तथापि स.बुखारी (तफसीर सू.हूद) मध्ये वर्णन केलेल्या अवतरणाच्या कारणाने माहित होते की, हे त्या मुसलमानांच्या बाबतीत अवतरीत झाले आहे की, जे लज्जेच्या कारणामुळे, शौच वगैरेच्या वेळी आणि पत्नीशी शय्यासोबत करतांना, नग्न होणे पसंत करीत नसत; की अल्लाहतआला आम्हांस पाहत आहे; म्हणून अशा प्रसंगी ते, गुप्तांगाला लपविण्यासाठी, आपल्या उरांस दुमटे करून घेत असत. अल्लाहने फर्माविले की, रात्रीच्या अंधारांत, जेव्हा ते आपल्या स्वत:ला बिछान्यांत कपड्यांनी लपेटून घेत होते, तर त्या वेळी सुद्धांतो त्यांना पाहत असे; आणि त्यांच्या गुप्त आणि उघड गोष्टींना जाणतो. अर्थ असा की, लज्जेची भावना, आपल्या ठिकाणी, फार चांगली आहे, परंतु याच्यात बरोबर नाही; म्हणून ज्या व्यक्तीत्त्वासाठी, ते असे करीत असत, त्यापासून तर ते, तरी सुद्धा लपू शकत नाही. तर मग अशा प्रकारच्या संकोचाचा काय फायदा?

وَمَا مِنْ دَآبَّةٍ فِي الْاَرْضِ اِلَّا عَلَى اللّٰهِ رِزْقُهَا وَيَعْلَمُ مُسْتَقَرَّهَا وَمُسْتَوْدَعَهَا ؕ كُلٌّ فِيْ كِتٰبٍ مُّبِيْنٍ ﴿٦﴾

जमिनीवर चालणारे फिरणारे जितके जीवधारी आहेत, सर्वांच्या उपजिविका अल्लाहवर आहेत;[१] तोच त्यांच्या रहाण्या सवरण्याच्या जागा जाणतो; तसेच त्यांचे सोपविण्याचे स्थान[२] सुद्धा; सर्व काही खुल्या पुस्तकांत नमुद केलेले आहे. (६)

وَهُوَ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ فِيْ سِتَّةِ اَيَّامٍ وَّكَانَ عَرْشُهٗ عَلَى الْمَآءِ لِيَبْلُوَكُمْ اَيُّكُمْ اَحْسَنُ عَمَلًا ؕ وَلَئِنْ قُلْتَ اِنَّكُمْ مَّبْعُوْثُوْنَ مِنْۢ بَعْدِ الْمَوْتِ لَيَقُوْلَنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْۤا اِنْ هٰذَاۤ اِلَّا سِحْرٌ مُّبِيْنٌ ﴿٧﴾

आणि तोच आहे, ज्याने सहा दिवसात, आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले. आणि त्याचे सिंहासन पाण्यावर[३]होते; कारण की, त्याने तुम्हास अजमवावे, की तुमच्यातून चांगली कर्मे करणारा कोण[४] आहे? जर, आपण यांना सांगाल की, तुम्ही लोक मेल्यानंतर, उठवून उभे केले जाल,तर काफिर लोक उलटवून उत्तर देतील की, ही तर निव्वळ, स्पष्ट स्पष्ट जादू आहे. (७)

وَلَئِنْ اَخَّرْنَا عَنْهُمُ الْعَذَابَ اِلٰۤى اُمَّةٍ مَّعْدُوْدَةٍ لَّيَقُوْلُنَّ مَا يَحْبِسُهٗ ؕ اَلَا يَوْمَ يَاْتِيْهِمْ لَيْسَ مَصْرُوْفًا عَنْهُمْ وَحَاقَ بِهِمْ مَّا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ﴿٨﴾

आणि जर आम्ही त्यांच्यावरून शिक्षेला, काही ठराविक मुदतीकरीतां, मागे टाकून देऊ, तर हे अवश्य म्हणतील की, शिक्षेला कोणत्या वस्तूंने अडवून ठेवले आहे? ऐका! ज्या दिवशी ती यांच्याजवळ येईल, मग त्यांच्यावरून टळणार नाही. मग ते ज्याचे हंसे उडवीत होते ते त्यानांच घेरुन घेईल.[५] (८)

وَلَئِنْ اَذَقْنَا الْاِنْسَانَ مِنَّا رَحْمَةً ثُمَّ نَزَعْنٰهَا مِنْهُ ۚ اِنَّهٗ لَيَـُٔوْسٌ كَفُوْرٌ ﴿٩﴾

जर आम्ही मनुष्याला आमच्या देणगीच्या मजा चाखवून, मग तिला त्याच्यापासून घेऊन घेऊ, तर तो मोठाच हतोत्साहीत, आणि मोठाच कृतघ्न होऊन जातो.[६] (९)

وَلَئِنْ اَذَقْنٰهُ نَعْمَآءَ بَعْدَ ضَرَّآءَ مَسَّتْهُ لَيَقُوْلَنَّ ذَهَبَ السَّيِّاٰتُ عَنِّيْ ؕ اِنَّهٗ لَفَرِحٌ فَخُوْرٌ ﴿١٠﴾

आणि आम्ही जर त्याला कोई नेअमत चाखवूं, या सक्तीनंतर, जी त्याला पोहोचून; चुकली होती, तर तो म्हणूलागतो की, बस आता माझ्यावरून सर्व संकटे टळली.[७] खचित्च तो मोठा ऐटबाज आणि गर्वीष्ठ आहे[८] (१०)

اِلَّا الَّذِيْنَ صَبَرُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ ؕ اُولٰٓئِكَ لَهُمْ مَّغْفِرَةٌ وَّاَجْرٌ كَبِيْرٌ ﴿١١﴾

त्यांच्याशिवाय की, जे सहनशिलता पत्करतात; आणि चांगली कामे करण्यात लागून रहातात; याच लोकांसाठी क्षमापण आहे आणि फार मोठे पुण्य[९] प्रतिफल आहे. (११)

فَلَعَلَّكَ تَارِكٌۢ بَعْضَ مَا يُوْحٰۤى اِلَيْكَ وَضَآئِقٌۢ بِهٖ صَدْرُكَ اَنْ يَّقُوْلُوْا لَوْلَاۤ اُنْزِلَ عَلَيْهِ كَنْزٌ اَوْ جَآءَ مَعَهٗ مَلَكٌ ؕ اِنَّمَاۤ اَنْتَ نَذِيْرٌ ؕ وَاللّٰهُ عَلٰى كُلِّ شَيْءٍ وَّكِيْلٌ ﴿١٢﴾

कदाचित् आपण या वह्याच्या काही भागाला सोडून देणार आहात, जे आपल्याकडे अवतरीत करण्यात येते, आणि याच्याने आपले मन संकुचित होऊन जाते; फक्त या गोष्टीवर की, (हे म्हणतात) याच्यावर कोणी खजीना का नाही उतरला? किंवा याच्या बरोबर कोणी देवदुतच आला असता; (ऐकून घ्या)! आपण तर फक्त भिवविणारेच आहात [१०] आणि प्रत्येक वस्तूचा जबाबदार अल्लाहतआला आहे (१२)

१) म्हणजे तो पोसणारा आणि जबाबदार आहे. जमिनीवर चालणारा प्रत्येक निर्मिती मनुष्य असो अथवा जिन्न, चरणारा असो अथवा उडणारा, लहान असो अथवा मोठा, समुद्रात रहाणारा असो अथवा जमिनीवर रहाणारा, प्रत्येकाला त्याच्या वर्ग आणि जातीच्या आवश्यकतेनुसार, तो उपजिवीका पुरवितो.

२) मुस्तकर्र (रहाण्या सवरण्याच्या ठिकाण) आणि मुस्तवदअ (सोपविण्याचे ठिकाणाच्या) व्यवस्थेत मतभेद आहे. काहींच्या जवळ जमिनीवर चालून फिरून, जेथे थांबून जातील 'मुसतकर्र' आहे. आणि ज्याला आपली जागा बनवेल, 'मुस्तवदअ' आहे. काहींच्या जवळ मातेचे उदर मुसतकर्र आणि पित्याच्या पाठीचा कणा मुसतवदअ आहे. आणि काहींच्या जवळ जीवनांत मनुष्य किंवा पशु जेथे वस्ती करून रहात असेल, ते ठिकाण 'मुसतकर्र' आहे; आणि जेथे मेल्यानंतर पुरण्यात येईल, ते 'मुस्तवदअ' आहे. (तफसीर इब्ने कसीर) इमाम शौकानी म्हणतात, मुसतकर्र ने अभिप्रेत मातेचे उदर आणि मुसतवदअ ने जमिनीचा तो भाग, ज्यात पुरण्यात येईल आणि इमाम हाकीमच्या एका रिवायतीनुसार यालाच प्राधान्य दिले आहे. तथापि जो पण अर्थ घेतला जाईल, महावाक्याचा भावार्थ स्पष्ट आहे की, अल्लाहतआलाला प्रत्येकाच्या मुसतकर्र व मुस्तवदअ चे ज्ञान आहे. याकरीता तो प्रत्येकाला उपजिविका पुरविण्याला समर्थ आहे. आणि

जबाबदार आहे. आणि तो आपली जबाबदारी पूर्ण करतो.
३) ही गोष्ट सहीह हदीसमध्ये सुद्धा, वर्णन करण्यात आली आहे. म्हणून एका हदीसमध्ये येते की, ''अल्लाहतआलाने आकाश आणि जमिनीच्या निर्मितीच्या पन्नास हजार वर्षांपूर्वी, प्राण्यांचे प्रारब्ध (तकदीर) लिहीले; त्यावेळी त्याचे सिंहासन पाण्यावर होते.'' (स.मुस्लीम)
४) म्हणजे हे आकाश आणि पृथ्वी, असेच निरर्थक आणि निरूद्देश्य. बनविले नाही. किंबहुना याचा उद्देश मनुष्य मात्राची आणि जिन्नांची परीक्षा घेणे आहे, की कोण चांगली कर्मे करतो.
५) येथे 'इस्तअजाल' (लवकर इच्छा व्यक्त करणे) ला 'इस्तहजा' साठी वापरण्यात आले आहे. कारण तो 'इस्तअजाल' 'इसतह्जा' म्हणूनच होत असे. सारांश, उद्देश्य हा समजावयाचा आहे की, अल्लाहतआलाकडून उशीराला, माणसाला गफलतीत टाकावयास नको. त्याची पकड केव्हा पण होऊ शकते.
६) मनुष्य मात्रांत जी सर्व साधारणपणे वाईट गोष्ट आढळून येते, यात आणि पुढील महावाक्यात यांचे वर्णन आहे. निराशेचा संबंध भविष्याशी आहे. आणि कृतघ्नतेचा संबंध भूतकाळाशी आणि वर्तमानाशी.
७) म्हणजे समजतो की, कठीण दिवस संपलेले आहेत. आता त्याला काही त्रास होणार नाही.
**'उम्मतुन,' चे निरनिराळे भावार्थ** : आयत क्र.८ मध्ये, 'उम्मत' चा शब्द आला आहे. हा कुरआन मजीदमध्ये, वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या अर्थाने उपयोगात आणला गेला आहे. हा 'उम्म' शी 'मुश्तक' आहे; ज्याचा अर्थ मनशेचा आहे. या ठिकाणी त्याचा अर्थ, ती वेळ आणि मुद्दतीचा आहे, जो शिक्षा सादर करण्याला लागणारा आहे. (फत्हुल कदीर) सू.यूसुफ आ.४५ 'वद्दकर बअ्द उम्मतिन' (त्याला मुद्दतीनंतर आठवण आली.) मध्ये सुद्धा हाच भावार्थ आहे. याच्याशिवाय ज्या अर्थांत याचा उपयोग झाला आहे. त्यातून (१)एक ईमाम आणि पेशवा आहे. जसे, 'इन्न् इब्राहीम काना उम्मतन' (सू. नहल-१२०). (२)मिल्लत आणि धर्म आहे. जसे ''इन्ना वजदना आबा अना अला उम्मतिन'' (सू. जुखरुफ-२३). (३)समूह आणि समाज आहे, जसे ''मदयनच्या पाण्यावर जेव्हा ते पोहोचले, तेव्हा त्यांनी पाहिले की, लोकांचा एक समूह (उम्मत) तेथे पाणी पाजत आहे. (सू. कसस-२३) ''व मिन कौम मूसा उम्मतुन (सू. अअराफ-१५९) वगैरे. (४)तो विशिष्ट समूह किंवा समाज ज्याच्याकडे कोणी पैगंबर पाठवला जावा. ''व लि कुल्ली उम्मतिन रसूल'' (सु. यूनुस-४७) याला उम्मते दावत पण म्हणतात. (५)आणि अशाचप्रकारे पैगंबरावर ईमान आणणाऱ्यांना सुद्धा उम्मत किंवा उम्मते इत्तबाअ किंवा उम्मते इजाबत म्हटले जाते. (इब्ने कसीर)
८) म्हणजे जे काही त्याच्याजवळ आहे, त्यावर ऐट दाखवितो, आणि दुसऱ्यांवर अहंकार आणि गर्व दाखवितो. परंतु या निंदनीय वैशिष्टांपासून ईमानवाले आणि चांगली कामे करणारे, अपवाद आहेत; जसे की पुढील महावाक्यात स्पष्ट आहे.
९) म्हणजे ईमानवाले, आरामात व आनंदात असो अथवा अडचणी आणि संकटात असो, दोन्ही स्थितीत, अल्लाहच्या आदेशांप्रमाणे, कर्मे करीत राहतात. जसे की हदीसमध्ये येते, नबी ﷺ नी शपथ खाऊन सांगितले, ''शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची, ज्याच्या हातात माझे प्राण आहे, अल्लाहतआला ईमानवाल्यांसाठी जो पण निर्णय घेतो, यात त्याच्यासाठी, चांगल्याचीच बाजू असते. जर त्याला आराम पोहचतो, तर तो यावर अल्लाहचे आभार मानतो. जो याच्यासाठी उत्तम (म्हणजे प्रतिफल मिळण्यास कारणीभूत) आहे आणि जर काही त्रास पोहचतो, तर सहन करतो. हे पण त्याच्यासाठी उत्तम (म्हणजे पुण्य प्रतिफल मिळण्यास कारणीभूत) आहे. हे वैशिष्टच, एका ईमानवाल्याशिवाय कोणाला प्राप्त नाही.'' (स.मुस्लिम) आणि आणखी एका हदीशीत सांगितले की, ''ईमानवाल्याला जे पण दु:ख, त्रास पोहचतो, येथपावेतो की, त्याला काटा टोचतो, तर अल्लाहतआला त्याच्यामुळे, त्याच्या चुका माफ करून टाकतो'' (मुसनद अहमद) सू.मआरिजचे महावाक्य १९-२२ मध्ये, पण हा विषय चर्चिला गेला आहे.
१०) मुशरिकीन, नबी ﷺ च्या बाबतीत, म्हणत असत की, याच्या बरोबर कोणी देवदूत का अवतरीत होत नाही; किंवा, त्याच्याकडे कोणी खजीना का म्हणून उतारण्यात येत नाही? (सू. अल् फुरकान ७-८) एका दुसऱ्या ठिकाणी सांगण्यात आले, ''आम्हास ठाऊक आहे की, हे लोक आपल्या बाबतीत, ज्या गोष्टी म्हणतात, त्यामुळे आपले अंत:करण संकुचित होऊन जाते.'' (सू.हिज्र-९७) या महावाक्यात याच गोष्टीच्या हवाल्याने, सांगण्यात येत आहे की,कदाचित् आपले अंत:करण संकुचित होईल, आणि काही गोष्टी, ज्या आपल्याकडे वह्य केल्या जातात; आणि त्या मुशरिकांना फारच जड वाटतात; शक्य आहे, आपण ती त्यांना ऐकविण्यास, पसंत करीत नसाल. परंतु आपण त्या गोष्टीची पर्वा केल्याशिवाय, त्यांना अल्लाहचे 'वह्य' ऐकवावे, त्यांना आवडो अगर न आवडो. ते मान्य करोत, किंवा नाकारोत आपले काम फक्त पोहचविण्याचे आणि प्रचाराचे आहे. ते आपण कुठल्याही स्वरुपात करीत रहावे.

أَمْ يَقُولُونَ افْتَرَىٰهُ ۖ قُلْ فَأْتُوا بِعَشْرِ سُوَرٍ مِّثْلِهِ مُفْتَرَيَاتٍ وَادْعُوا مَنِ اسْتَطَعْتُم مِّن دُونِ اللَّهِ إِن كُنتُمْ صَادِقِينَ ﴿١٣﴾

काय हे म्हणतात की, या कुरआनाला यानेच रचले आहे; (आपण) उत्तर द्या की, मग तुम्ही सुद्धा याच्यासारखे दहा अध्याय, रचलेले घेऊन या. आणि अल्लाहला सोडून, ज्याला इच्छाल आपल्या बरोबर मिळवून पण घ्या, जर तुम्ही खरे आहात[१] (१३)

فَإِلَّمْ يَسْتَجِيبُوا لَكُمْ فَاعْلَمُوا أَنَّمَا أُنزِلَ بِعِلْمِ اللَّهِ وَأَن لَّا إِلَٰهَ إِلَّا هُوَ ۖ فَهَلْ أَنتُم مُّسْلِمُونَ ﴿١٤﴾

मग जर ते आपल्या या गोष्टीला कबूल करणार नाहीत, तर मग तुम्ही नक्की जाणून घ्या की हे कुरआन अल्लाहच्या ज्ञानाबरोबर उतारले गेले आहे; आणि हे की, अल्लाहशिवाय कोणी उपास्य नाही. तर काय तुम्ही मुसलमान होता ?[२] (१४)

مَن كَانَ يُرِيدُ الْحَيَاةَ الدُّنْيَا وَزِينَتَهَا نُوَفِّ إِلَيْهِمْ أَعْمَالَهُمْ فِيهَا وَهُمْ فِيهَا لَا يُبْخَسُونَ ﴿١٥﴾

जो मनुष्य ऐहिक जीवन, आणि त्याच्या भुषणावर लुब्ध होतो, आम्ही अशांना, त्यांच्या सर्व कर्मांचा (बदला) येथेच देवून टाकतो. आणि येथे त्यांना कुठलीही कमतरता पडू दिली जात नाही. (१५)

أُولَٰئِكَ الَّذِينَ لَيْسَ لَهُمْ فِي الْآخِرَةِ إِلَّا النَّارُ ۖ وَحَبِطَ مَا صَنَعُوا فِيهَا وَبَاطِلٌ مَّا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿١٦﴾

हां! हेच ते लोक आहेत, ज्यांच्या करता परलोकांत अग्नीशिवाय आणखी काही नाही. आणि जे काही त्यांनी केले होते, ते सर्व निरर्थक आहे, आणि जी काही त्यांची कर्मे होती, सर्व बरबाद[३] होतील (१६)

أَفَمَن كَانَ عَلَىٰ بَيِّنَةٍ مِّن رَّبِّهِ وَيَتْلُوهُ شَاهِدٌ مِّنْهُ وَمِن قَبْلِهِ كِتَابُ مُوسَىٰ إِمَامًا وَرَحْمَةً ۚ أُولَٰئِكَ يُؤْمِنُونَ بِهِ ۚ وَمَن يَكْفُرْ بِهِ مِنَ الْأَحْزَابِ فَالنَّارُ مَوْعِدُهُ ۚ فَلَا تَكُ فِي مِرْيَةٍ مِّنْهُ ۚ إِنَّهُ الْحَقُّ مِن رَّبِّكَ وَلَٰكِنَّ أَكْثَرَ النَّاسِ لَا يُؤْمِنُونَ ﴿١٧﴾

काय तो मनुष्य, जो आपल्या पालनकर्त्याच्या प्रमाणावर असेल, आणि त्याच्या बरोबर, अल्लाहकडून साक्षीदार असेल, आणि त्याच्या पूर्वी मूसाचे पुस्तक (साक्षीदार असेल) जो मार्गदर्शक आणि रहमत आहे. (दुसऱ्यांच्या बरोबर होऊ शकतो[४]?) हेच लोक आहेत, जे यावर ईमान आणतात[५]. आणि सर्व पंथांमधून, जो पण याला नाकारणारा असेल, त्याचे शेवटचे वायद्याचे ठिकाण नरकाग्नी आहे[६] मग तू याच्याकडून कुठल्याही शंकेत राहू नकोस. खचित्‌च हे तुझ्या पालनकर्त्याकडून, निव्वळ सत्यावर आहे; परंतु बहुतेक लोक ईमान आणणारे नसतात.[७] (१७)

وَمَنْ أَظْلَمُ مِمَّنِ افْتَرَىٰ عَلَى اللَّهِ كَذِبًا ۚ أُولَٰئِكَ يُعْرَضُونَ عَلَىٰ رَبِّهِمْ وَيَقُولُ الْأَشْهَادُ هَٰؤُلَاءِ الَّذِينَ كَذَبُوا عَلَىٰ رَبِّهِمْ ۚ أَلَا لَعْنَةُ اللَّهِ عَلَى الظَّالِمِينَ ﴿١٨﴾

आणि त्यापेक्षाही आणखी अत्याचारी कोण असेल, जो अल्लाहकडे खोटे लावेल;[८] हे लोक आपल्या पालनकर्त्यासमोर उभे केले जातील, आणि सर्व साक्षीदार म्हणतील, हे ते लोक आहेत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याकडे खोटे लावले; सावधान व्हा की, अल्लाहचा शाप आहे, अत्याचारी[९] (लोकां) वर (१८)

الَّذِينَ يَصُدُّونَ عَن سَبِيلِ اللَّهِ وَيَبْغُونَهَا عِوَجًا وَهُم بِالْآخِرَةِ هُمْ كَافِرُونَ ﴿١٩﴾

जे अल्लाहच्या मार्गापासून अडवितात, आणि त्याच्यात वाकडेपणा शोधतात;[१०] हेच परलोकाचे नाकारणारे आहेत (१९)

१) इमाम इब्ने कसीर (रह.) लिहीतात की, प्रथम अल्लाहतआलाने आवाहन दिले की, जर तुम्ही आपल्या या दाव्यात खरे आहात की हे मोहम्मद (ﷺ) चे रचलेले कुरआन आहे, तर याच्यासारखे सादर करून दाखवून द्या; आणि तुम्ही ज्याची इच्छाल, त्याची मदत मिळवून घ्या. परंतु तुम्ही कधीही असे करूंशकणार नाही. अल्लाह ने फर्माविले, ''घोषणा करून द्या की, जर सर्व मनुष्ये आणि सर्व जिन्न मिळून, या कुरआनासारखे आणू इच्छितील, तर त्या सर्वांकडून याच्यासारखे आणणे अशक्य आहे. जरी ते आपसांत एक दुसऱ्याचे मददगार पण बनून जावोत.'' (सू. बनी इस्राईल-८८) याच्यानंतर अल्लाहतआलाने, हे आवाहन दिले की, पूर्ण कुरआन बनवून सादर करू शकत नाहीत, तर दहा अध्यायच बनवून सादर करा. जसे की या ठिकाणी आहे. मग तिसऱ्या क्रमांकावर आवाहन दिले की, चला जाऊ द्या! फक्त एकच अध्याय बनवून दाखवा. जसे की, सू.यूनुस ची. आ.३९ आणि सू.बकर च्या सुरवातीमध्ये सांगितले. (तफसीर इब्ने कसीर, सू.यूनुसच्या आयत अंतर्गत) आणि याच्या आधारावर शेवटचे आवाहन हे होऊशकते, याच्यासारखी एकच गोष्ट बनवून दाखवा. ''काय हे म्हणतात की, या पैगंबराने, कुरआन स्वत: रचले आहे? खरे असे आहे की, यांच्यात ईमान नाही. बरे! जर हे खरे आहेत, तर याच्यासारखी एक गोष्ट यांनी पण आणून दाखववी.'' (सू. तूर-३४) परंतु अवतरण्याच्या क्रमाने, आवाहनाच्या या क्रमाचे समर्थन होत नाही. वल्लाह अअ्लम बिस्सवाब!

२) म्हणजे, काय याच्यानंतर सुद्धा तुम्ही या आवाहनाचे उत्तर देण्यास असमर्थ आहात, हे मान्य करण्याकरीता, की 'हे कुरआन अल्लाहचेच अवतरीत केलेले आहे'; तयार नाहीत आणि न मुसलमान होण्यास तयार आहेत?
३) या दोन महावाक्यांच्या बाबतीत, काहींचा विचार आहे की, यात देखावा करणाऱ्यांचा उल्लेख आहे. काहींच्याजवळ याच्याने अभिप्रेत, यहूदी आणि ख्रिस्ती आहेत. आणि काहींच्या जवळ यात इहलोकाच्या इच्छुकांचा उल्लेख आहे. कारण की, इहलोकातील इच्छुकपण काही चांगली कर्मे करतात, अल्लाहतआला त्यांचा बदला या जगांतच देऊन टाकतो. परलोकांत, त्यांच्या करीता, शिक्षेशिवाय आणखी काहीही असणार नाही. याच विषयाला कुरआन मजीदमध्ये सू.बनी इस्राईल आ.१८-२१ आणि सू.शूरा आ.२० मध्ये वर्णन करण्यात आले आहे.
४) नाकारणारे आणि काफिर यांच्या तुलनेत, स्वाभाविक प्रकृतिचे लोक आणि ईमानवाले, यांची चर्चा केली जात आहे. ''आपल्या पालनकर्त्याकडून प्रमाण'' ने अभिप्रेत ती नैसर्गिक प्रवृत्ती आहे, ज्यावर अल्लाहतआलाने मानवांना निर्माण केले आहे; आणि ती आहे, एका उपास्याला मान्य करणे, आणि त्याचीच उपासना करणे. ज्याप्रमाणे की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची हदीस आहे की, ''प्रत्येक मूल नैसर्गिक प्रवृत्तीवर जन्माला येते, मग त्याच्यानंतर त्याचे आईबाप, त्याला यहूदी, ख्रिस्ती किंवा अग्नीपुजक बनवून देतात''.(स. बुखारी स. मुस्लिम) 'यतलूहु' चा अर्थ आहे, याच्या नंतर. म्हणजे त्याच्याबरोबर, अल्लाहकडून एक साक्षीदार पण असावा. साक्षीदाराने अभिप्रेत, कुरआन किंवा मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत; जे या योग्य नैसर्गिक प्रवृत्तीकडे आमंत्रण देतात आणि तिच्याकडे मार्गदर्शन करतात. आणि याच्यापूर्वी मूसाचे पुस्तक तौरातपण जे पेशवापण आहे. आणि दयेला कारणीभूत पण आहे. म्हणजे हे मूसाचे पुस्तकपण कुरआनावर ईमान आणण्याकरीता मार्गदर्शन करणारे आहे. अर्थ हा आहे की, एक तो मनुष्य आहे, जो नाकारणारा आणि काफिर आहे; आणि याच्या तुलनेत एक दुसरा मनुष्य आहे, जो अल्लाहकडून प्रमाणावर स्थिर आहे. यावर एक साक्षीदार (कुरआन किंवा इस्लामचे पैगंबर) पण आहे. याचप्रमाणे याच्यापूर्वी अवतरीत झालेले तौरात आहे, ज्याच्याकरीता मार्गदर्शनाची व्यवस्था करण्यात आली आहे. आणि तो ईमान घेऊन येतो. काय ही दोन्ही माणसे बरोबर होऊ शकतात? म्हणजे हे दोन्ही बरोबर होऊ शकत नाही. कारण की एक ईमानवाला आहे आणि दुसरा काफिर. एक प्रत्येक प्रकारच्या प्रमाणांनी सुसज्ज आहे, आणि दुसरा अगदीच रिकामा आहे.
५) म्हणजे ज्यांच्यात, चर्चित वैशिष्ट्ये आढळून येतील, ते कुरआन करीम आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर ईमान आणतील.
६) सर्व पंथांनी अभिप्रेत, जगात आढळून येणारे धर्म आहेत. यहूदी, ख्रिस्ती, झरतुष्टी, बौद्धमत,अग्नीपुजक आणि मुशरिकीन व काफिर, वगैरे. जो पण ह.मुहम्मद रसूलुल्लाह् ﷺ वर आणि कुरआनावर ईमान आणणार नाही, त्याचे ठिकाण नरकाग्नी आहे. हा तोच विषय आहे, ज्याला या हदीसमध्ये सांगण्यात आले आहे; ''शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची ज्याच्या हातात माझे प्राण आहे, या लोकसमूहाच्या ज्या यहूदी किंवा ख्रिस्त्याने माझ्या पैगंबरीबाबत ऐकले, आणि मग माझ्यावर ईमान आणले नाही, तो नरकाग्नीत जाईल.'' (स.मुस्लीम) हा विषय याच्यापूर्वी, सू.बकर आ.६२ आणि सू.निसा आ.१७०-१७२ मध्ये येऊन चुकला आहे.
७) हा तोच विषय आहे, जो कुरआन मजीदमध्ये वेगवेगळ्या ठिकाणी सांगण्यात आला आहे. ''तुझी इच्छा असून सुद्धा बहुतेक लोक ईमान आणणार नाही.'' (सू.यूसुफ-१०३) ''इबलीसने आपला अंदाज खरा करून दाखविला. ईमान आणणाऱ्यांच्या एका समूहाशिवाय, सर्व त्याचे अनुयायी बनून गेले.'' (सू.सबा-२०)
८) म्हणजे ज्यांना अल्लाहने या विश्वात, दखल देण्याचा, किंवा परलोकांत शिफारस करण्याचा अधिकार दिलेला नाही; यांच्याबाबतीत हे म्हटले जावे की, त्यांना अल्लाहने हा अधिकार दिला आहे.
९) हदीसमध्ये याचे भाष्य अशाप्रकारे येते की, कयामतच्या दिवशी, अल्लाहतआला एका ईमानवाल्याकडून, त्याच्या अपराधांची कबुली मिळवीन की, तुला ठाऊक आहे की, तू अमुक गुन्हा पण केला होता, तमुक गुन्हांपण केला होता; तो ईमानवाला म्हणेन होय! हे सत्य आहे! अल्लाहतआला फर्मावील की जगात सुद्धा (त्यावर) पर्दा टाकला होता. जा! आजपण त्यांना माफ करीत आहे. परंतु दुसरे लोक किंवा काफिरांचा मामला, असा होईल की, त्यांना, साक्षीदारांसमोर पुकारले जाईल. आणि साक्षीदार ही साक्ष देतील की, हेच ते लोक आहेत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्यावर खोटा आळ घेतला होता. (स.बुखारी तफसीर सू.हूद)
१०) म्हणजे लोकांना अल्लाहच्या मार्गापासून अडविण्याकरीता, याच्यात वक्रता शोधता, आणि लोकांना यापासून बहकवितात.

أُولَٰٓئِكَ لَمۡ يَكُونُواْ مُعۡجِزِينَ فِي ٱلۡأَرۡضِ وَمَا كَانَ لَهُم مِّن دُونِ ٱللَّهِ مِنۡ أَوۡلِيَآءَۘ يُضَٰعَفُ لَهُمُ ٱلۡعَذَابُۚ مَا كَانُواْ يَسۡتَطِيعُونَ ٱلسَّمۡعَ وَمَا كَانُواْ يُبۡصِرُونَ ٢٠

**हे लोक इहलोकांत अल्लाहला हरवू शकत, नाही त्यांचा कोणी हिमायत करणारा अल्लाहशिवाय झाला. यांच्याकरीता शिक्षा दुप्पट केली जाईल. न हे ऐकण्याची शक्ती बाळगत होते न हे पहातच होते.**[१] (२०)

أُوْلَٰٓئِكَ ٱلَّذِينَ خَسِرُوٓاْ أَنفُسَهُمۡ وَضَلَّ عَنۡهُم مَّا كَانُواْ يَفۡتَرُونَ ٢١

**हेच आहेत ज्यांनी, आपले नुकसान स्वत:च करून घेतले. आणि त्यांच्याकडून ज्या ज्या बनावट गोष्टी ते करीत होते, त्या नाहीशा होऊन गेल्या** (२१)

لَا جَرَمَ أَنَّهُمۡ فِي ٱلۡأٓخِرَةِ هُمُ ٱلۡأَخۡسَرُونَ ٢٢

**नि:संशय हेच लोक परलोकांत तोट्यांत राहणारे असतील** (२२)

إِنَّ ٱلَّذِينَ ءَامَنُواْ وَعَمِلُواْ ٱلصَّٰلِحَٰتِ وَأَخۡبَتُوٓاْ إِلَىٰ رَبِّهِمۡ أُوْلَٰٓئِكَ أَصۡحَٰبُ ٱلۡجَنَّةِۖ هُمۡ فِيهَا خَٰلِدُونَ ٢٣

**खचित्‌च ज्या लोकांनी ईमान आणले, आणि त्यांनी कामेपण चांगली केली आणि पालनकर्त्यापुढे नतमस्तक होत राहिले, तेच स्वर्गांत जाणारे आहेत, जेथे ते सदासर्वकाल रहाणारे आहेत** (२३)

۞ مَثَلُ ٱلۡفَرِيقَيۡنِ كَٱلۡأَعۡمَىٰ وَٱلۡأَصَمِّ وَٱلۡبَصِيرِ وَٱلسَّمِيعِۚ هَلۡ يَسۡتَوِيَانِ مَثَلًاۚ أَفَلَا تَذَكَّرُونَ ٢٤

**या दोन्ही समूहांचे उदाहरण आंधळे व बहिरे, आणि पाहणारे आणि ऐकणाऱ्यांसारखे आहे**[२] **काय हे दोन्ही उदाहरणात सारखे आहेत? काय तरी सुद्धा तुम्ही उपदेश ग्रहण करीत नाहीत?** (२४)

وَلَقَدۡ أَرۡسَلۡنَا نُوحًا إِلَىٰ قَوۡمِهِۦٓ إِنِّي لَكُمۡ نَذِيرٞ مُّبِينٌ ٢٥

**खचित्‌च आम्ही नूहला त्याच्या लोकांकडे पैगंबर बनवून पाठविले की, मी तुम्हास स्पष्ट स्पष्ट सावध करून देणारा आहे.** (२५)

أَن لَّا تَعۡبُدُوٓاْ إِلَّا ٱللَّهَۖ إِنِّيٓ أَخَافُ عَلَيۡكُمۡ عَذَابَ يَوۡمٍ أَلِيمٖ ٢٦

**की तुम्ही फक्त अल्लाहचीच उपासना करा**[३]**; मला तर तुमच्यावर दु:खदायक दिवसाच्या शिक्षेचे भय आहे.**[४] (२६)

१) म्हणजे यांचे सत्यापासून तोंड फिरविणे, आणि द्वेष इतक्या थराला पोहचला होता, की त्याला ऐकण्याची आणि पाहण्याची शक्तीच बाळगत नव्हते. किंवा हा अर्थ आहे की, अल्लाहने त्यांना कान आणि डोळे तर दिले होते, परंतु त्यांनी यांच्याने सत्य गोष्ट ऐकली नाही, आणि पाहिली नाही. जणूं, ''न यांच्या कानाने, त्यांना काही फायदा पोहोचवला न त्यांच्या डोळ्यांनी आणि न अंत:करणांनी'' (सू. अहकाफ-२६) कारण की' ते सत्य ऐकण्यासाठी बहिरे, आणि सत्य पाहण्यासाठी आंधळे बनून राहिले. ज्याप्रमाणे की, ते नरकाग्नीत प्रवेश करतांना, म्हणतील,'' जर आम्ही ऐकतो, आणि बुद्धीने काम घेतो, तर आज नरकाग्नीत न जातो.'' (सू. मुल्क -१०)

२) मागील महावाक्यांमध्ये, ईमानवाले व काफिर, आणि भाग्यशाली व दुर्दैवी, दोघांची चर्चा केली. आता यात दोघांचे उदाहरण देऊन, दोघांच्या वास्तवाला आणखी स्पष्ट केले जात आहे. सांगितले, एक उदाहरण आंधळा आणि बहिऱ्याचे आहे. आणि दुसऱ्याचे, पाहणारा आणि ऐकणाऱ्या सारखे आहे. काफिर या जगांत, सत्याचे योग्य स्वरूप पाहण्यापासून वंचित आणि परलोकांत, मुक्तीमार्गापासून, बेखबर, त्याचप्रमाणे सत्त्याची प्रमाणे ऐकण्यापासून वंचित असतो. म्हणजे अशा गोष्टीपासून वंचित असतो, ज्या त्याच्यासाठी फायदेकारक असतील. याच्याउलट ईमानवाला, समजदार, सत्याला पाहणारा, आणि सत्य व असत्यात फरक करणारा असतो. म्हणून तो सत्य आणि भलाईचे अनुकरण करतो. प्रमाणांना ऐकतो, आणि त्यांच्या मार्फत शंका कुशंकाचे निर्सन करतो. आणि निरर्थक गोष्टीपासून (स्वत:ला) वांचवतो. काय हे दोन्ही बरोबर होऊं शकतात? उत्तर, नकारार्थींच आहे. म्हणजे दोन्ही बरोबर होऊ शकत नाही. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''स्वर्गवासी आणि नर्कवासी बरोबर होऊं शकत नाही. स्वर्गवासी तर सफल होणारे आहेत.'' (सू. हश्र-२०) आणखी एका जागी याला अशा प्रकारे सांगितले, ''आंधळा आणि पाहणारा बरोबर नाही. अंध:कार आणि प्रकाश, सावली आणि ऊन समान नाहीत. जिवंत आणि मृत समान नाहीत.'' (सू. फातिर - १९-२०)

३) हे तेच एकेश्वरवादाचे आवाहन आहे, जे प्रत्येक पैगंबराने येऊन, आपल्या लोकांना केले. ज्याप्रमाणे सांगितले, ''जे पैगंबर आम्ही आपल्यापूर्वी पाठविले, त्यांच्याकडे हेच वह्य केले की, माझ्या शिवाय अन्य कोणी उपास्य नाही; फक्त माझीच भक्ती करा.'' (सू. अंबिया-२५)

४) म्हणजे जर माझ्यावर ईमान आणले नाही, आणि याच्या एकेश्वरवादाच्या आवाहनाला अंगीकारले नाही, तर अल्लाहच्या शिक्षेपासून तुम्ही वाचू शकत नाही.

فَقَالَ الْمَلَاُ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ قَوْمِهٖ مَا نَرٰىكَ اِلَّا بَشَرًا مِّثْلَنَا وَ مَا نَرٰىكَ اتَّبَعَكَ اِلَّا الَّذِيْنَ هُمْ اَرَاذِلُنَا بَادِیَ الرَّاْیِ ۚ وَمَا نَرٰی لَكُمْ عَلَيْنَا مِنْ فَضْلٍۭ بَلْ نَظُنُّكُمْ كٰذِبِيْنَ ﴿٢٧﴾

त्याच्या लोकांतील, काफिरांच्या सरदारांनी उत्तर दिले, की आम्ही तर तुला आपल्या सारखाच एक मनुष्य पाहत आहोत;[१] आणि तुला मानणाऱ्यांमध्ये सुद्धां, आम्ही पाहत आहोत की, जे अति नीच[२] आणि कमी समजवाल्यांच्या शिवाय[३] आणखी कोणी नाही. आम्ही तर तुमचे कुठल्याही प्रकारचे श्रेष्ठत्व, आमच्यावर पाहत नाही; किंबहुना आम्ही तर तुला लबाड समजतो. (२७)

قَالَ يٰقَوْمِ اَرَءَيْتُمْ اِنْ كُنْتُ عَلٰی بَيِّنَةٍ مِّنْ رَّبِّیْ وَاٰتٰىنِیْ رَحْمَةً مِّنْ عِنْدِهٖ فَعُمِّيَتْ عَلَيْكُمْ ؕ اَنُلْزِمُكُمُوْهَا وَاَنْتُمْ لَهَا كٰرِهُوْنَ ﴿٢٨﴾

नूहने म्हटले, हे माझ्या लोकांनो! मला सांगा की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून कोण्या प्रमाणावर असलो आणि मला त्याने, आपल्या जवळची कोणी, देणगी अता केली असेल[४]; मग ती तुमच्या दृष्टीत[५] आली नसेल, तर काय जबरदस्तीने तुमच्या गळी उतखून देऊ? वास्तविक तुम्ही यापासून त्रस्त[६] असाल (२८)

وَيٰقَوْمِ لَاۤ اَسْـَٔلُكُمْ عَلَيْهِ مَالًا ؕ اِنْ اَجْرِیَ اِلَّا عَلَی اللّٰهِ وَمَاۤ اَنَا بِطَارِدِ الَّذِيْنَ اٰمَنُوْا ؕ اِنَّهُمْ مُّلٰقُوْا رَبِّهِمْ وَلٰكِنِّیْۤ اَرٰىكُمْ قَوْمًا تَجْهَلُوْنَ ﴿٢٩﴾

हे माझ्या लोकांनो ! मी याच्यावर तुमच्याजवळून काही धनसंपंत्ती तर मागीत नाही;[७] माझे पुण्य प्रतिफल तर फक्त अल्लाहतआलाकडेच आहे. तसेच मी ईमानवाल्यांना, आपल्या जवळून काढून लाऊ शकत नाही.[८] त्यांना आपल्या पालनकर्त्याला भेटावयाचे आहे; परंतु मी पाहतो की, तुम्ही लोक अडाणीपणा करत आहात[९] (२९)

وَيٰقَوْمِ مَنْ يَّنْصُرُنِیْ مِنَ اللّٰهِ اِنْ طَرَدْتُّهُمْ ؕ اَفَلَا تَذَكَّرُوْنَ ﴿٣٠﴾

हे माझ्या लोकांनो! जर मी या ईमानवाल्यांना, आपल्या जवळून हाकलून देईन, तर अल्लाहच्या मुकाबल्यात, माझी मदत कोण करणार आहे[१०]? काय तुम्ही जरा सुद्धा चिंतन मनन करत नाही? (३०)

وَلَاۤ اَقُوْلُ لَكُمْ عِنْدِیْ خَزَآئِنُ اللّٰهِ وَلَاۤ اَعْلَمُ الْغَيْبَ وَلَاۤ اَقُوْلُ اِنِّیْ مَلَكٌ وَّلَاۤ اَقُوْلُ لِلَّذِيْنَ تَزْدَرِیْۤ اَعْيُنُكُمْ لَنْ يُّؤْتِيَهُمُ اللّٰهُ خَيْرًا ؕ اَللّٰهُ اَعْلَمُ بِمَا فِیْۤ اَنْفُسِهِمْ ۚ اِنِّیْۤ اِذًا لَّمِنَ الظّٰلِمِيْنَ ﴿٣١﴾

मी तुम्हास असे सांगत नाही की, मजजवळ अल्लाहचे खजिने आहेत. (ऐका!) माझ्याजवळ अदृष्टाचे ज्ञान पण नाही. मी हे पण म्हणत नाही, की मी कोणी देवदूत आहे. तसेच माझे हे पण म्हणणे नाही, की ज्यांच्यावर तुमची दृष्टी तुच्छतेने पडत आहे, त्याला अल्लाहतआला कोणी देणगी देणारच नाही.[११] यांच्या मनात जे आहे, त्याला अल्लाहच खूप जाणतो. जर मी अशी गोष्ट करेन, तर खचित्‌च माझी गणती जालिमांमधून होऊन जाईल. [१२] (३१)

قَالُوْا يٰنُوْحُ قَدْ جٰدَلْتَنَا فَاَكْثَرْتَ جِدَالَنَا فَاْتِنَا بِمَا تَعِدُنَاۤ اِنْ كُنْتَ مِنَ الصّٰدِقِيْنَ ﴿٣٢﴾

(त्याच्या लोकांनी) म्हटले, हे नूह! तू आमच्याशी भांडला आणि फारच भांडण करून चुकलास.[१३] आता तर, आम्हास ज्या गोष्टीपासून धमकावित आहेस, तीच आमच्याजवळ घेऊन ये. जर तू खऱ्यापैकी[१४] आहेस (३२)

قَالَ اِنَّمَا يَاْتِيْكُمْ بِهِ اللّٰهُ اِنْ شَآءَ وَمَاۤ اَنْتُمْ بِمُعْجِزِيْنَ ﴿٣٣﴾

उत्तर दिले की, तिलाही अल्लाहतआलाच आणेल, जर तो इच्छील, आणि होय! तुम्ही त्याला हरवू शकत नाही[१५] (३३)

१) ही तीच शंका आहे, ज्याचे याच्यापूर्वी अनेक ठिकाणी खुलासेवार सांगण्यात आले आहे की, काफिरांना पैगंबरांचे मनुष्य असणे फार विचित्र वाटत होते. ज्याप्रमाणे आजच्या बिदअत्‌वाल्यांना सुद्धा विचित्र वाटते. आणि ते पैगंबराचे मनुष्य होण्याला नाकारतात.

२) सत्त्याच्या इतिहासात, ही गोष्टसुद्धा प्रत्येक काळी, पुढे येत राहिली आहे की, सुरवातीला याला अंगिकारणारे, नेहमी ते लोक असतात, ज्यांना समाजांत तुच्छ आणि नीच समजण्यात येत होते. आणि वैभवसंपन्न आणि सुस्थितीचा वर्ग, यापासून वंचित रहात असे. येथपर्यंत की ही गोष्ट पैगंबराच्या अनुयायांची, एक लक्षण बनून गेली. म्हणून रोमचा बादशाह हिरकल, ने ह.अबुसुफयान ﵁ ला, नबी ﷺ च्या बाबतीत गोष्टी विचारल्या, तर त्यांत एक गोष्ट ही पण विचारली की, ''त्याचे अनुकरण करणारे, समाजात प्रतिष्ठीत समजले जाणारे लोक आहेत किंवा दुर्बल लोक?'' तेव्हा ह. अबु सुफयान ﵁ ने उत्तरात सांगितले, ''दुर्बल लोक.'' ''ज्यावर हिरक्लने म्हटले, पैगंबराचे अनुयायी हेच लोक असतात'' (स.बुखारी) कुरआन करीममध्ये सुद्धा खुलासा केला गेला आहे की, ''सुसंपन्न वर्गच, सर्वांत प्रथम

पैगंबरांना नाकारत राहिला आहे.'' (सू. जुखरूफ-२३) आणि ही ईमानवाल्यांची ऐहिक स्थिती होती. आणि ज्याच्या अनुषंगाने 'कुफ्र' वाले त्यांना क्षुल्लक आणि नीच समजत असत. नाही तर, वास्तविकता तर ही आहे की, सत्त्याचे अनुयायी प्रतिष्ठीत आणि सभ्य आहेत, जरी ते धनसंपत्तीच्या दृष्टीने, गरीबच असोत. आणि सत्त्याला नाकारणारे, क्षुल्लक आणि अप्रतिष्ठीत आहेत; जरी ते ऐहिक दृष्टीने, श्रीमंतच असावे.

३) ईमानवाले, जेकी अल्लाह आणि रसूलच्या आदेशाच्या विरुध्द आपली बुध्दी आणि मताचा उपयोग करत नाही. म्हणून काफिर असे समजतात की, हे नासमज आहेत की, अल्लाहचा पैगंबर त्यांना जिकडे वळवून देतो, हे वळून जातात. ज्यापासून मना करतो, थांबून जातात. हे देखील ईमानवाल्यांचे मोठे वैशिष्टच आहे. तथापि ईमानसाठी हे आवश्यक आहे.

४) 'बय्यनतिन' ने अभिप्रेत ईमान आणि विश्वास आहे. आणि रहमतने पैगंबरी. जी अल्लाहतआलाने ह.नूह ﷺ ला दिली होती.

५) म्हणजे तुम्ही याला पाहण्यापासून आंधळे होऊन गेले. म्हणून तुम्ही त्याची कदर केली नाही; न त्याला अंगिकारण्याला तयार झाले. किंबहुना त्याला खोटे ठरविण्याला आणि खंडन करण्याला उभे ठाकले.

६) जर ही गोष्ट आहे, तर ही हिदायत आणि दया (रहमत) तुमच्या वाट्याला कशी येऊ शकते ?

७) कारण की तुमच्या डोक्यात ही शंका न येऊन जावी की, या पैगंबरीच्या दाव्याने याचा उद्देश्य तर ऐहिक धनसंपत्ती एकत्रित करणे आहे. मी तर हे काम फक्त अल्लाहच्या हुकुमाने आणि त्याच्या प्रसन्नतेसाठी करीत आहे. तोच मला त्याचे प्रतिफळ पण देईन.

८) याच्याने ठाऊक होते की, ह.नूह ﷺ च्या लोकांतील सरदारांना सुद्धा, समाजांत दुर्बल समजले जाणारे ईमानवाल्यांना, ह.नूह ﷺ ला आपल्या बैठकी किंवा आपल्या जवळीकपासून, दूर ठेवण्याची मागणी केली असावी. ज्याप्रमाणे मक्केच्या श्रीमंतांनी, रसूल ﷺ जवळ, अशी मागणी केली होती. ज्यावर अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत केले होते, ''हे पैगंबरा! या लोकांना आपल्यापासून दूर करू नका; जे सकाळ संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याचा धावा करतात.'' (सू. अन्आम-५२) ''आपल्या स्वत:ला त्या लोकांसोबत जोडून ठेवा, जे आपल्या पालनकर्त्याचा सकाळ संध्याकाळ धावा करतात; आपल्या पालनकर्त्याची सुप्रसन्नता इच्छितात. आपली दृष्टी (त्यांना टाळून, कोण्या दुसऱ्याकडे) न वळावी (सू. कहफ-२८)

९) म्हणजे अल्लाह व त्याच्या पैगंबरांना मानणाऱ्यांना, क्षुल्लक समजणे, आणि मग त्यांना, पैगंबरांच्या जवळीकपासून दूर करण्याची मागणी करणे, हा तुमचा अडाणीपणा आहे. हे तर या लायकीचे आहेत की, त्यांचा मान सन्मान केला जावा; न की दूर हाकलून देण्यात यावे.

१०) जणू, अशा लोकांना आपल्यापासून दूर ठेवणे, अल्लाहच्या क्रोध आणि अप्रसन्नतेला कारणीभूत आहे.

११) किंबहुना अल्लाहतआलाने तर त्यांना, ईमानाच्या स्वरूपांत मोठी भलाई देऊन ठेवली आहे. आणि ज्याच्या आधारावर ते परलोकांत सुद्धा, स्वर्गाच्या देणग्यांनी लाभान्वयीत् होतील; आणि जगात सुद्धा अल्लाहतआला इच्छिल तर, उच्च पदावर स्थानापन्न होतील. जणू तुमचे त्यांना क्षुल्लक समजणे, त्यांच्यासाठी कोण्या नुकसानाला कारणीभूत नाही. अलबत्ता तुम्हीच अल्लाहजवळ अपराधी गणले जाल की, अल्लाहच्या सदाचरणी सेवकांना, ज्यांचे अल्लाहजवळ मोठे स्थान आहे, तुम्ही क्षुल्लक आणि दुर्बल समजतात.

१२) कारण की मी त्यांच्या बाबतीत, अशी गोष्ट सांगावी, ज्याचे मला ज्ञान नाही; फक्त अल्लाह जाणतो, तर हा जुलुम आहे.

१३) परंतु, असे असूनसुद्धा आम्ही ईमान आणले नाही.

१४) हा तोच मूर्खपणा आहे, ज्याचा अंगिकार मार्गभ्रष्ट लोक करीत आले आहेत की, ते आपल्या पैगंबरांना सांगत आले आहेत की, जर तू खरा आहेस तर आमच्यावर शिक्षा उतरव, आणि आम्हाला बर्बाद करून टाक. वास्तविक यांना जर अक्कल असती तर ते म्हणते, की जर तू खरा आहेस; आणि खरोखर अल्लाहचा पैगंबर आहेस; तर आमच्यासाठी पण प्रार्थना कर की, अल्लाहतआलाने आमच्या अंत:करणाला पण उघडून द्यावे; की आम्ही त्याचा अंगिकार करून घ्यावा.

१५) म्हणजे शिक्षेचे येणे निव्वळ अल्लाहच्या मर्जीवर अवलंबून आहे. असे नाही की, जेव्हा मी इच्छेन तुमच्यावर शिक्षा येऊन लागावी. तथापि ज्यावेळी अल्लाह शिक्षेचा निर्णय घेईल, किंवा पाठवून देईल, तर त्याला कोणी भाग पाडू शकणार नाही.

وَلَا يَنفَعُكُمْ نُصْحِىٓ إِنْ أَرَدتُّ أَنْ أَنصَحَ لَكُمْ
إِن كَانَ ٱللَّهُ يُرِيدُ أَن يُغْوِيَكُمْ ۚ هُوَ رَبُّكُمْ وَإِلَيْهِ
تُرْجَعُونَ ﴿٣٤﴾

**तुम्हाला माझे, भले इच्छणे, काहीही फायदा देऊ शकत नाही; जरी मी तुमचे कितीही भले का इच्छू नये; या अटीवर की, अल्लाहचा इरादा तुम्हाला मार्गभ्रष्ट करण्याचा असेल.[१] तोच तुम्हा सर्वांचा पालनकर्ता आहे;[२] आणि त्याच्याचकडे तुम्हा सर्वांस परतून जाणे आहे (३४)**

أَمْ يَقُولُونَ ٱفْتَرَىٰهُ ۖ قُلْ إِنِ ٱفْتَرَيْتُهُۥ فَعَلَىَّ إِجْرَامِى
وَأَنَا۠ بَرِىٓءٌ مِّمَّا تُجْرِمُونَ ﴿٣٥﴾

**काय हे म्हणतात की, या (कुरआना) ला स्वत: यानेच रचले आहे? आपण उत्तर द्या की, जर मी त्याला रचले असते, तर माझा अपराध माझ्यावर आहे. आणि मी त्या अपराधांपासून अलिप्त आहे, जे तुम्ही करीत आहात[३] (३५)**

وَأُوحِىَ إِلَىٰ نُوحٍ أَنَّهُۥ لَن يُؤْمِنَ مِن قَوْمِكَ إِلَّا
مَن قَدْ ءَامَنَ فَلَا تَبْتَئِسْ بِمَا كَانُوا۟ يَفْعَلُونَ ﴿٣٦﴾

**नूहकडे वह्य पाठविण्यात आले की, तुझ्या लोकांतून जे ईमान आणून चुकले, त्यांच्या शिवाय आणखी कोणी, आता ईमान आणणारच नाही. बस! तू त्यांच्या कृत्यांवर उदास होऊ नकोस[४] (३६)**

وَٱصْنَعِ ٱلْفُلْكَ بِأَعْيُنِنَا وَوَحْيِنَا وَلَا تُخَٰطِبْنِى
فِى ٱلَّذِينَ ظَلَمُوٓا۟ ۚ إِنَّهُم مُّغْرَقُونَ ﴿٣٧﴾

**आणि एक नाव, आमच्या दृष्टीसमोर, आणि आमच्या वह्याप्रमाणे, तयार[५] कर. आणि जालिमांच्या बाबतीत, आमच्याशी कुठलीही गोष्ट करू नकोस; ते पाण्यात बुडवून टाकण्यात येणार आहेत[६] (३७)**

१) 'इग्वा' मार्गभ्रष्ट करण्याच्या अर्थांत आहे. म्हणजे तुमचे कुफ्र आणि अहंकार जर येथपर्यंत पोहोचला आहे, जेथून कोण्या माणसाला परतून येणे आणि हिदायतचा अंगिकार करणे, अशक्य आहे; तर या स्थितीला, अल्लाहतआलाकडून मोहर लावून देणे म्हटले जाते; ज्यानंतर हिदायतची काही आशा बाकी राहत नाही. अर्थ असा की, जर तुम्ही सुद्धाअशा भयंकर वळणावर पोहोचून चुकला असाल, तर मी तुमचे कितीही भले इच्छित असेल, म्हणजे हिदायतवर आणण्याचा आणखी जास्त प्रयत्न करील, तर हे प्रयत्न आणि भले इच्छिणे, तुमच्या करिता फायदेकारक नाही. कारण की तुम्ही मार्गभ्रष्टतेच्या शेवटच्या टोकाला पोहोचून चुकला आहात.

२) मार्गदर्शन आणि मार्गभ्रष्टता पण, त्याच्याच हातात आहे. आणि त्याच्याचकडे तुम्हा सर्वांस पलटून जाणे आहे. जेथे तो तुम्हास तुमच्या कर्मांचा बदला देईल. सदाचरणी लोकांना त्यांच्या सुकृत्याचा बदला; आणि दुराचरणी लोकांना त्यांच्या कुकृत्यांची शिक्षा देईल.

३) काही भाष्यकारांजवळ हे संभाषण, नूह عليه السلام चे लोक आणि ह.नूह عليه السلام च्या दर्म्यान झाले. आणि काहींचा विचार आहे, नबी अकरम ﷺ आणि मक्केच्या मुशरिकीनच्या दरम्यान होणारे संभाषण आहे. अर्थ असा की, जर हे कुरआन मी रचलेले आहे, आणि मी, हे अल्लाहकडून आहे असे म्हणण्यात खोटा आहे; तर हा माझा अपराध आहे. याची शिक्षा मीच भोगेन. परंतु तुम्ही जे काही करीत आहात, त्यापासून मी अलिप्त आहे, याचे पण तुम्हाला भान आहे? याचे ओझे तर माझ्यावर नाही, तुम्हावरच पडेल, याचीही तुम्हास काही काळजी आहे?

४) हे त्यावेळी, सांगण्यात आले, जेव्हा ह. नूह عليه السلام च्या लोकांनी शिक्षेची मागणी केली. आणि ह.नूह عليه السلام नी अल्लाहच्या समक्ष प्रार्थना केली की, हे माझ्या पालनकर्त्या! जमिनीवर एक काफिर सुद्धा, वस्ती करून राहणारा, ठेवू नकोस! अल्लाहतआलाने म्हटले आता आणखी कोणी ईमान आणणार नाही. तू त्या च्यावर दु:ख करू नकोस.

५) ''आमच्या दृष्टीसमोर'' चा अर्थ आहे, आमच्या देखरेखीमध्ये. आणि 'आमच्या वह्याने' चा अर्थ तिच्या लांबी रुंदी वगैरेची जी मापे आम्ही सांगितली आहेत; त्याप्रमाणे तिला बनव. या ठिकाणी काही भाष्यकारांनी, नावेची लांबी व रुंदी, तिचे मजले आणि कोणत्या प्रकारचे लाकुड, आणि दुसरा कोणता सामान इच्यात वापरण्यांत आला; याचा तपशील दिला आहे. जी उघड गोष्ट आहे की, कोण्या ठोस पुराव्यावर आधारित नाही. याच्या तपशीलाचे संपूर्ण ज्ञान फक्त अल्लाहलाच आहे.

६) काहींनी याच्याने अभिप्रेत, ह.नूह عليه السلام चे मुलगे आणि त्यांच्या पत्नीला गणले आहे, जे ईमानवाले नव्हते. आणि बुडणाऱ्यांमधून होते. काहींनी याच्याने बुडून जाणारा, सर्व समाज गृहीत धरला आहे. आणि अर्थ हा आहे की, त्यांच्याकरता कुठलीही सवलत इच्छू नकोस; कारण की, आता त्यांची नष्ट होण्याची वेळ येऊन ठेपली आहे. किंवा हा अर्थ आहे की, त्यांच्या नष्ट होण्याची घाई करू नये; ठरलेल्या वेळी, हे सर्व बुडून जातील (फत्हुल कदीर)

وَيَصْنَعُ الْفُلْكَ وَكُلَّمَا مَرَّ عَلَيْهِ مَلَأٌ مِّنْ قَوْمِهِ سَخِرُوْا مِنْهُ ۚ قَالَ إِنْ تَسْخَرُوْا مِنَّا فَإِنَّا نَسْخَرُ مِنْكُمْ كَمَا تَسْخَرُوْنَ ﴿٣٨﴾

**आणि ते (नूह. अ.) नाव बनवू लागले. त्यांच्या लोकांचा जो समूह, त्याच्या जवळून जाई, तो त्याची थट्टा करी[१] . ते म्हणत, जर तुम्ही आमची थट्टा करतात, तर आम्ही सुद्धा तुमच्यावर एका दिवशी हसू जसे तुम्ही आमच्यावर हसत आहात. ३८**

فَسَوْفَ تَعْلَمُوْنَ ۙ مَنْ يَّأْتِيْهِ عَذَابٌ يُّخْزِيْهِ وَيَحِلُّ عَلَيْهِ عَذَابٌ مُّقِيْمٌ ﴿٣٩﴾

**तुम्हास फारच लवकर ठाऊक होऊन जाईल, की कोणावर शिक्षा येणार आहे; जी त्याला फजीत करेल. आणि त्याच्यावर नित्य नेहमीची शिक्षा[२] अवतरीत होईल ३९**

حَتّٰٓى إِذَا جَآءَ أَمْرُنَا وَفَارَ التَّنُّوْرُ ۙ قُلْنَا احْمِلْ فِيْهَا مِنْ كُلٍّ زَوْجَيْنِ اثْنَيْنِ وَأَهْلَكَ إِلَّا مَنْ سَبَقَ عَلَيْهِ الْقَوْلُ وَمَنْ اٰمَنَ ۚ وَمَآ اٰمَنَ مَعَهٗٓ إِلَّا قَلِيْلٌ ﴿٤٠﴾

**येथ पावेतो की, जेव्हा आमचा हुकूम येऊन पोहचला, आणि भट्टीला उत येऊ लागला;[३] आम्ही सांगितले की, या नांवेत प्रत्येक प्रकारच्या दाम्पत्याला स्वार करून [४] घे. आणि आपल्या घरांतील लोकांना सुद्धा; शिवाय त्याच्या ज्यांच्यावर पहिलेच गोष्ट होऊन चुकली [५] आहे. आणि सर्व ईमानवाल्यांवर सुद्धा,[६] त्याच्याबरोबर ईमान आणणारे फारच थोडे होते.[७] ४०**

وَقَالَ ارْكَبُوْا فِيْهَا بِسْمِ اللّٰهِ مَجْرٖىهَا وَمُرْسٰىهَا ۚ إِنَّ رَبِّيْ لَغَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٤١﴾

**आणि (नूहने) म्हटले, या नावेत बसून जा. अल्लाहच्याच नावाने हिचे चालणे आणि थांबणे[८] आहे. खचित्च, माझा पालनकर्ता मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ४१**

१) उदाहरणार्थ म्हणत, ''पैगंबरी करता, आता सुतार काम सुरू करून दिलेस?'' किंवा म्हणत, ''हे नूह! कोरड्यात नाव कशाकरिता तयार करीत आहेस?''

२) याच्याने अभिप्रेत नरकाग्नीची नेहमी राहणारी शिक्षा आहे. जी यांच्या ऐहिक शिक्षेनंतर, त्यांच्यासाठी तयार आहे.

३) याच्याने काहींनी भाकरी भाजणाऱ्या भट्ट्या, काहींनी विशिष्ट जागा उदाहरणार्थ झरे उगम पावण्याच्या जागा, काहींनी जमिनीचे भूपृष्ठ गृहीत धरले आहे. हाफीज इब्ने कसीरने याच शेवटच्या भावार्थाला ग्राह्य धरले आहे. म्हणजे सर्व जमीनच झऱ्यांसारखी वाहू लागली. वरून आकाशांतील पावसाने राहिलेली कसर भरून काढली.

४) याच्याने अभिप्रेत नर आणि माद्या आहेत. अशाप्रकारे प्रत्येक प्रकारच्या निर्मितीचा एक जोडा,नावेत ठेवून घेण्यात आला. आणि काही म्हणतात की, वनस्पती पण ठेवण्यात आल्या होत्या. वल्लाह् अअ्लम्!

५) म्हणजे ज्यांचे बुडून जाणे अल्लाहने प्रारब्धात लिहून ठेवले आहे. याच्याने अभिप्रेत सर्व साधारण काफिर आहेत; म्हणजे आपल्या घरांतील लोकांना, नावेवर स्वार करून घे, शिवाय त्यांच्या, ज्यांच्यावर अल्लाहची गोष्ट सिद्ध होऊन चुकली आहे; म्हणजे एक मुलगा (कन् आन किंवा याम) आणि ह.नूह عليه السلام ची पत्नी (वाईला), हे दोन्ही काफिर होते. यांना नावेत बसणांऱ्यापासून, वगळण्यांत आले.

६) म्हणजे सर्व ईमानवाल्यांना नावेत बसवून घे.

७) काहींनी यांची एकूण संख्या, (स्त्रीयांआणि पुरुष मिळून) ८०, आणि काहींनी याच्यापेक्षा पण कमी सांगितली आहे. याच्यात ह.नूह عليه السلام चे तीन मुलगे, जे ईमान आणणाऱ्यात शामील होते; साम,हाम,याफस आणि त्यांच्या पत्न्या, आणि चौथी पत्नी यामची होती, जो काफिर होता; परंतु त्याची पत्नी मुसलमान असल्या कारणाने, नांवेत स्वार होती. (इब्ने कसीर)

८) म्हणजे अल्लाहच्या हुकूमाने हिचे पाण्याच्या पृष्ठभागावर चालणे, आणि त्याच्यात नांवावर तिचे थांबणे आहे. याच्याने एक उद्देश्य ईमानवाल्यांना सांत्वना देणे आणि त्यांना हिंमत देणे, हा पण होता; की कुठल्याही भय आणि धोक्याशिवाय नावेत स्वार होऊन जा. अल्लाहतआलाच या नावेचा संरक्षणकर्ता आणि देखभाल करणारा आहे. त्याच्या आज्ञेने चालेल आणि त्याच्याच आज्ञेने थांबेल. ज्याप्रमाणे अल्लाहतआलाने दुसऱ्या ठिकाणी सांगितले की, ''हे नूह ! जेव्हा तूं आणि तुझे साथीदार नावेत बसवून जातील तेव्हा म्हणा, '' सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे, ज्याने आम्हाला जालीम लोकांपासून सुटकारा दिला; आणि म्हण की, हे माझ्या पालनकर्त्या मला बरकतीवाले उतारणे उतार आणि तूच उत्तम उतारणारा आहेस.'' (सू.मूमेनुन-२८-२९) काही धर्मपंडीतांनी नाव किंवा स्वारीवर बसतेवेळी, ''बिस्मिल्लाहि मजरिहा व मुरसाहा'' चे म्हणणे योग्य ठरविले आहे. परंतु हदीसने, ''सुबहानल्लजी स ख्खर लना हाजा वमा कुन्ना लहू मुकरिनीन, व इन्ना इला रब्बिना ल मुनकलीबून'' म्हणणे सिद्ध आहे.

وَهِيَ تَجْرِي بِهِمْ فِي مَوْجٍ كَالْجِبَالِ ۞ وَنَادَىٰ نُوحٌ
ابْنَهُ وَكَانَ فِي مَعْزِلٍ يَا بُنَيَّ ارْكَب مَّعَنَا وَلَا
تَكُن مَّعَ الْكَافِرِينَ ﴿٤٢﴾

आणि ती नाव त्यांना घेऊन पर्वतासारखी लाटांमध्ये, जात होती.[१] आणि नूहने, आपल्या मुलाला जो एका किनाऱ्याला होता, ओरडून सांगितले की,हे माझ्या प्रिय मुला! आमच्याबरोबर स्वार होऊन जा; आणि काफिरांमध्ये शामील राहू नकोस[२] ४२

قَالَ سَآوِي إِلَىٰ جَبَلٍ يَعْصِمُنِي مِنَ الْمَاءِ ۚ قَالَ
لَا عَاصِمَ الْيَوْمَ مِنْ أَمْرِ اللَّهِ إِلَّا مَن رَّحِمَ ۚ وَحَالَ
بَيْنَهُمَا الْمَوْجُ فَكَانَ مِنَ الْمُغْرَقِينَ ﴿٤٣﴾

त्याने उत्तर दिले की, मी तर कोण्या मोठ्या पर्वताच्या आश्रयाला जाऊन पोहोचेन; जो मला, पाण्यापासून वांचवून घेईल.[३] नूहने म्हटले, आज अल्लाहच्या हुकूमापासून वांचणारा कोणी नाही; फक्त तेच वाचतील,ज्यांच्यावर अल्लाहची दया होईल. या वेळी, त्या दोघांच्या दर्म्यान एक लाट, आडवी आली; आणि तो बुडणाऱ्यांमधूण, होऊन गेला[४] ४३

وَقِيلَ يَا أَرْضُ ابْلَعِي مَاءَكِ وَيَا سَمَاءُ أَقْلِعِي وَغِيضَ
الْمَاءُ وَقُضِيَ الْأَمْرُ وَاسْتَوَتْ عَلَى الْجُودِيِّ ۖ وَقِيلَ
بُعْدًا لِّلْقَوْمِ الظَّالِمِينَ ﴿٤٤﴾

आणि हुकूम देण्यात आला की, हे जमिनी! आपल्या पाण्याला गिळून[५] जा. आणि हे आकाशा! बस, आता थांबून जा. त्याचवेळी, पाणी अटवून देण्यात आले. आणि काम तमाम करून देण्यात आले[६] आणि नाव 'जूदी[७] नावाच्या पर्वतावर जाऊन पोहोचली; आणि सांगून देण्यात आले की, अन्याय करणाऱ्या लोकांवर अल्लाहचा शाप अवतरीत होवो[८] ४४

وَنَادَىٰ نُوحٌ رَّبَّهُ فَقَالَ رَبِّ إِنَّ ابْنِي مِنْ أَهْلِي
وَإِنَّ وَعْدَكَ الْحَقُّ وَأَنتَ أَحْكَمُ الْحَاكِمِينَ ﴿٤٥﴾

आणि नूहने आपल्या पालनकर्त्याला पुकारले, आणि सांगितले की, हे माझ्या पालनकर्त्या माझा मुलगा तर माझ्या घरवाल्यांमधून आहे. खचित्च तुझा वायदा बिल्कुल खरा आहे. आणि तू सर्व अधिकाऱ्यात, उत्तम अधिकारी[९] आहेस ४५

قَالَ يَا نُوحُ إِنَّهُ لَيْسَ مِنْ أَهْلِكَ ۖ إِنَّهُ عَمَلٌ غَيْرُ
صَالِحٍ ۖ فَلَا تَسْأَلْنِ مَا لَيْسَ لَكَ بِهِ عِلْمٌ ۖ إِنِّي
أَعِظُكَ أَن تَكُونَ مِنَ الْجَاهِلِينَ ﴿٤٦﴾

अल्लाहतआलाने म्हटले हे नूह! खचित्च तो तुझ्या कुटुंबात दाखल नाही;[१०] कारण त्याची कृत्ये चांगली नाहीत.[११] तुला मुळीच ती गोष्ट मागावयास नको, ज्याचे तुला काहीच ज्ञान नाही;[१२] मी तुला समजाऊन सांगतो की, तू अडाणी लोकांत आपली गणती करण्यापासून, दूर रहावे[१३] ४६

قَالَ رَبِّ إِنِّي أَعُوذُ بِكَ أَنْ أَسْأَلَكَ مَا لَيْسَ لِي بِهِ
عِلْمٌ ۖ وَإِلَّا تَغْفِرْ لِي وَتَرْحَمْنِي أَكُن مِّنَ
الْخَاسِرِينَ ﴿٤٧﴾

नूहने म्हटले हे माझ्या पालनकर्त्या! मी तुझाच आश्रय मागतो, या गोष्टीपासून की मी तुजजवळ ते मागावे, ज्याचे मला काही ज्ञान नसावे. जर तू मला क्षमा करणार नाही. आणि जर तू माझ्यावर दया करणार नाहीस, तर मी मोठी हानी भोगणाऱ्यांमधून होऊन जाईन[१४] ४७

قِيلَ يَا نُوحُ اهْبِطْ بِسَلَامٍ مِّنَّا وَبَرَكَاتٍ عَلَيْكَ
وَعَلَىٰ أُمَمٍ مِّمَّن مَّعَكَ ۚ وَأُمَمٌ سَنُمَتِّعُهُمْ ثُمَّ
يَمَسُّهُم مِّنَّا عَذَابٌ أَلِيمٌ ﴿٤٨﴾

सांगून देण्यात आले की, हे नूह! आम्हाकडून सुखशांती आणि बरकत यासह तूं उतर[१५] जे तुझ्यावर आहेत, आणि तुझ्याबरोबर अनेक लोक[१६] समूहावर; आणि पुष्कळशा त्या उम्मत असतील, ज्यांना आम्ही फायदा तर जरूर पोहचवू; नंतर मग त्यांना (त्यांच्या आज्ञाभंगामुळे) दु:खदायक शिक्षा पोहोचेल[१७] ४८

१) म्हणजे जेव्हा जमिनीवर पाणी होते, येथपावेतो की पर्वतसुद्धा पाण्यात बुडालेले होते; ही नाव ह.नूह عليه السلام आणि त्यांच्या साथीदारांना, आपल्यात सामावून घेऊन, अल्लाहच्या आज्ञेने आणि त्याच्या संरक्षणात, डोंगराप्रमाणे चालत होती. नाही तर एवढ्या तुफानी पाण्यात वादळ वाऱ्यात नावेची स्थिती ती काय असते? याचसाठी दुसऱ्या ठिकाणी अल्लाहने याला उपकार म्हणून सांगितले. ''जेव्हा पाण्याला उधाण आले, त्यावेळी आम्ही, तुम्हांस नावेवर चढवून दिले, यासाठी की तिला तुमच्याकरीता एक धडा आणि स्मृती बनवून द्यावे. आणि यासाठी की, लक्षांत ठेवणाऱ्या कानांनी, याला लक्षांत ठेवावे'' (सू. हाक्का ११/१२) ''आणि आम्ही त्याला तक्ते आणि खिळ्यावाल्या नावेवर स्वार करून दिले; जी आमच्या डोळ्यासमोर, चालत होती. हा बदला होता, त्याच्याकडून ज्याला

नाकारण्यात आले होते.'' (सू. कमर-१३-१४)

२) हा ह.नूह ﷺ चा लहान मुलगा होता. ज्याचे उपनाम 'कनआन' आणि नाव 'याम' होते. त्याला ह.नूह ﷺ नी आवाहन दिले की, मुसलमान होऊन जा. आणि काफिरांबरोबर सामील राहून, बुडून जाणाऱ्यात होऊ नकोस.

३) त्याचा विचार होता की, कोण्या मोठ्या पर्वताच्या शिखरावर चढून, मी आश्रय प्राप्त करून घेईन. तेथे पाणी कसे काय पोहोचेल?

४) पिता पुत्रांत हे संभाषण चालूच होते की, एका तुफानी लाटेने, त्याला आपल्या भयंकर स्वरूपात गिळंकृत करून टाकले.

५) 'गिळणे' चा उपयोग जनावरांकरता होतो की, ते आपल्या तोंडातील अन्नाला गिळून टाकतात. येथे पाण्याच्या आटण्याला, गिळून जाण्याने संबोधित केले गेले आहे. यात हे प्रयोजन वाटते की, पाणी हळूहळू आटले नव्हते; किंबहुना अल्लाहच्या हुकूमाने, जमिनीने सर्व पाणी अचानक, अशा प्रकारे आपल्यात गिळून घेतले, ज्याप्रमाणे जनावरे घांस गिळतात.

६) म्हणजे सर्व काफिरांना, पाण्यात बुडवून टाकण्यात आले.

७) 'जूदी' पर्वताचे नाव आहे. जो काहिंच्या म्हणण्याप्रमाणे, 'मोसिल' च्या जवळ आहे. ह.नूह ﷺ चे लोकपण, याच्याजवळ वस्ती करून राहत होते.

८) 'बुअद्' हे नष्ट होणे आणि अल्लाहच्या शापाच्या अर्थांत आहे. आणि कुरआन करीममध्ये विशेष करून, अल्लाहच्या क्रोधाच्या निशाण्या बनणाऱ्या लोक समूहांसाठी, याला कित्येक जागी वापरण्यात आले आहे.

९) ह. नूह ﷺ नी कदाचित् पितृवात्सल्याने प्रेरित होऊन, अल्लाहच्या दरबारात ही प्रार्थना केली. आणि काही म्हणतात की, त्यांना असे वाटत होते की, कदाचित् हा मुसलमान होऊन जाईल, म्हणून त्याच्या बाबतीत ही इच्छा केली.

१०) ह.नूह ﷺ नी वांशिक नातेसंबंधाचा विचार करून, त्याला आपला पुत्र ठरविले. परंतु अल्लाहतआलाने ईमानाच्या आधारावर, धार्मिक नातेसंबंधाच्या अनुषंगाने, या गोष्टीला नाकारले की, तो तुझ्या घराण्यातून आहे. कारण की, एका पैगंबराचे खरे घराणे तर तेच आहे, जो त्याच्यावर ईमान आणील; मग तो कोणीही असो. आणि जर कोणी ईमान आणले नाही, तर मग जरी तो पैगंबराचा बाप असो, अथवा मुलगा, अथवा पत्नी; ती पैगंबराच्या घराण्याची व्यक्ती नाही.

११) हे अल्लाहतआलाने त्याचे कारण सांगून दिले. याच्याने ठाऊक झाले की, ज्याचे ईमान आणि चांगली कामे नसतील, त्याला अल्लाहच्या शिक्षेपासून, अल्लाहचा पैगंबरसुद्धा वाचविण्याला असमर्थ आहे. आज काल लोक, पीर,फकीर आणि कोण्या बुजूर्ग किंवा पीर फकीराच्या बरोबर उठ बस करणाऱ्यालाच, मुक्तीसाठी पुरेसा समजतात. आणि चांगली कामे करण्याची आवश्यकता समजत नाही. वास्तविक जेव्हा चांगल्या कामांशिवाय, पैगंबराशी वांशिक नातेसंबंध पण कामा येत नाही, तर हे संबंध, काय कामा येऊ शकतात?

१२) याच्याने ठाऊक झाले की, पैगंबर अदृष्टाचा ज्ञाता नसतो. त्याला तेवढेच ज्ञान असते, तेवढे 'वह्य' च्या मार्फत, अल्लाहतआला त्याला देत असतो. जर ह.नूह ﷺ ला पहिल्यापासून ज्ञान असते की, त्यांच्या मागणीचा विचार केला जाणार नाही, तर त्यांनी खचित्च यापासून आपल्या स्वत:ला दूर ठेवले असते.

१३) हा अल्लाहतआलाकडून ह.नूह ﷺ ला उपदेश आहे. ज्याचा उद्देश्य त्यांना त्या उच्च पदावर विराजमान करण्याचा आहे, जे कर्म करणाऱ्या ज्ञानी लोकांसाठी, अल्लाहच्या दरबारांत आहे.

१४) जेव्हा, ह.नूह ﷺ ला, ही गोष्ट ठाऊक झाली की, त्यांची मागणी वास्तवतेला धरून नव्हती; तर लगेच त्यासाठी माफी मागून घेतली; आणि अल्लाहतआलाकडून त्याच्या दया आणि क्षमेचे इच्छुक झाले.

१५) हे उतरणे त्या नांवेतून, किंवा त्या पर्वतावरून आहे, ज्यावर नौका जाऊन थांबली होती.

१६) याच्याने अभिप्रेत एक तर ते गट आहेत, जे ह.नूह ﷺ बरोबर नौकेत स्वार होते. किंवा भविष्यात होणारे ते गट आहेत, जे त्यांच्या वंशातून होणार होते. पुढच्या शब्दांच्या अनुषंगाने हाच दुसरा भावार्थ जास्त बरोबर आहे.

१७) हे ते समूह आहेत, जे नौकेत वांचून जाणाऱ्यांच्या वंशातून, कयामत पर्यंत होतील. अर्थ हा आहे की, या काफिरांना या जगाची थोड्या दिवसांचे जीवन जगण्यासाठी, आम्ही ऐहिक साधन सामुग्री अवश्य देऊ; परंतु सरशेवटी, मग ,दु:ख दायक शिक्षा भोगावी लागेल.

تِلْكَ مِنْ أَنبَاءِ الْغَيْبِ نُوحِيهَا إِلَيْكَ ۖ مَا كُنتَ
تَعْلَمُهَا أَنتَ وَلَا قَوْمُكَ مِن قَبْلِ هَٰذَا ۖ فَاصْبِرْ ۖ
إِنَّ الْعَاقِبَةَ لِلْمُتَّقِينَ ﴿٤٩﴾

**या बातम्या, अदृष्टाच्या बातम्यांमधून आहेत. ज्याचे वह्य आम्ही आपल्याकडे करीत आहोत. यांना याच्यापूर्वी आपण जाणत नव्हता, न आपले लोक[१] (जाणत होते) म्हणून आपण सहन करीत रहा. (विश्वास ठेवा) की, उत्तम परिणाम अल्लाहला भिऊन चालणाऱ्यांचाच आहे.[२]** (४९)

وَإِلَىٰ عَادٍ أَخَاهُمْ هُودًا ۚ قَالَ يَا قَوْمِ اعْبُدُوا اللَّهَ
مَا لَكُم مِّنْ إِلَٰهٍ غَيْرُهُ ۖ إِنْ أَنتُمْ إِلَّا مُفْتَرُونَ ﴿٥٠﴾

**आणि आदच्या लोकांकडे, त्यांचा भाऊ हूद यास आम्ही[३] पाठविले; त्याने सांगितले हे माझ्या लोकांनो! अल्लाहचीच उपासना करा. त्याच्या शिवाय तुमचा कोणी (अन्य) उपास्य नाही. तुम्ही तर फक्त निव्वळ कुभांड रचत आहात[४]** (५०)

يَا قَوْمِ لَا أَسْأَلُكُمْ عَلَيْهِ أَجْرًا ۖ إِنْ أَجْرِيَ إِلَّا عَلَى
الَّذِي فَطَرَنِي ۚ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿٥١﴾

**हे माझ्या समाजबंधूंनो! मी याचे तुमच्याकडून काही वेतन तर मागीत नाही; माझे वेतन तर त्याच्याचकडे आहे, ज्याने मला निर्माण केले आहे; तर काय, तरी सुद्धा तुम्ही, बुद्धीने काम घेत नाहीत?[५]** (५१)

وَيَا قَوْمِ اسْتَغْفِرُوا رَبَّكُمْ ثُمَّ تُوبُوا إِلَيْهِ يُرْسِلِ
السَّمَاءَ عَلَيْكُم مِّدْرَارًا وَيَزِدْكُمْ قُوَّةً إِلَىٰ قُوَّتِكُمْ
وَلَا تَتَوَلَّوْا مُجْرِمِينَ ﴿٥٢﴾

**हे माझ्या समाजबांधवांनो! तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे आपल्या अपराधांची क्षमा मागा. आणि त्याच्याकडे पश्चात्ताप व्यक्त करा; कारण की त्याने वर्षा करणारे ढग, तुमच्यावर पाठवून द्यावे; आणि तुमच्या शक्तीवर आणखी शक्ती आणि सामर्थ्य वाढवून द्यावे.[६] आणि तुम्ही अपराधी होऊन, तोंड फिरवू नका[७]** (५२)

१) हे नबी ﷺ ला संबोधन आहे. आणि त्यांना अदृष्टाचे ज्ञान होते, याला नाकारण्यात येत आहे; की या अदृष्टाच्या बातम्या आहेत, ज्यापासून आपणास आम्ही सावध करीत आहोत. नाहीतर तुम्ही आणि तुमचे लोक यांना याचे ज्ञान नव्हते.

२) म्हणजे तुमचे लोक, तुम्हास जे खोटे ठरवित आहे, आणि इजा पोहचवित आहेत, यावर धैर्याने काम करा. यासाठी की आम्ही तुमचे मददगार आहोत. आणि सुपरिणाम तुमच्यासाठी, आणि तुमच्या मानणाऱ्यासाठीच आहे. जे ईशभयाच्या वैशिष्टयाने सुशोभित आहेत. 'आकिबत्' इहलोक आणि परलोकाच्या चांगल्या परिणामाला म्हणतात. यांत अल्लाहला भिणाऱ्यांसाठी मोठे शुभवर्तमान आहे; की सुरवातीला जरी त्यांना कितीही संकटांचा सामना करावा लागो, तथापि सरशेवटी अल्लाहची मदत आणि सहाय्य, आणि सुपरिणामाला तेच पात्र आहेत. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''खचित्च आम्ही आपल्या पैगंबराची आणि ईमानवाल्यांची मदत, ऐहिक जीवनांत पण करू, आणि त्या दिवशी पण करू जेव्हा साक्ष देणारे उभे राहतील.'' (सू. मूअमिन-५१) ''आणि अलबत् आमचा वायदा, पहिलेच, आपल्या पैगंबरासाठी सादर होऊन चुकला आहे, की ते मदत दिले गेलेले असतील. आणि आमचेच सैन्य वर्चस्व आणि श्रेष्ठत्व प्राप्त करणारे असेल.'' (सू. साफ्फात १७१-१७३)

३) भावाने अभिप्रेत, त्यांच्याच समाजातील एक व्यक्ती.

४) म्हणजे अल्लाहबरोबर दुसऱ्यांना सरकतदार ठरवून, तुम्ही खोटे कुभांड रचित आहात.

५) आणि हे समजत नाही की, जो विना वेतन, आणि विना प्रलोभन, तुम्हांस अल्लाहकडे बोलावित आहे, तो तुमचे भले इच्छिणारा आहे.

६) ह.हूद عليه السلام ने पश्चात्ताप आणि क्षमायाचना करण्यास, आपल्या उम्मत म्हणजे आपल्या लोकांना सांगितले. आणि त्याचे ते फायदे वर्णन करून सांगितले, जे पश्चात्ताप आणि क्षमायाचना करणाऱ्या लोकांना प्राप्त होतात. ज्याप्रमाणे कुरआन करीममध्ये, आणखीही काही ठिकाणी, हे फायदे वर्णन करण्यात आले आहेत. (कृपया पहावे सू.नूह-११) आणि नबी ﷺ चे पण फर्मान आहे, ''जो नियमितपणे क्षमायाचना (इस्तगफार) करतो, अल्लाहतआला त्याच्यासाठी प्रत्येक काळजीत मुक्तता, आणि प्रत्येक अडचणीत मार्ग, काढून देतो. आणि त्याला अशा ठिकाणाहून उपजिविका देतो जी त्याच्या गुमान मध्ये सुद्धा नसते.'' (अबुदाऊद इब्ने माजा)

७) म्हणजे मी तुम्हाला जे आमंत्रण देत आहे, यापासून तोंड फिरविणे, आणि आपल्या कुफ्रवर अडून राहू नका. असे कराल तर अल्लाहच्या समक्ष, अपराधी आणि गुन्हेगार बनून, हजर व्हाल.

قَالُوْا يٰهُوْدُ مَا جِئْتَنَا بِبَيِّنَةٍ وَّمَا نَحْنُ بِتَارِكِيْٓ اٰلِهَتِنَا عَنْ قَوْلِكَ وَمَا نَحْنُ لَكَ بِمُؤْمِنِيْنَ ﴿٥٣﴾

**त्यांनी म्हटले हे हूद! तू आमच्याजवळ तर काही प्रमाण तर आणले नाहीत; आणि आम्ही फक्त तुझ्या म्हणण्याने, आपल्या उपास्यांना सोडणारे नाहीत. न आम्ही तुझ्यावर ईमान आणणार आहोत.**(१) ﴿५३﴾

اِنْ نَّقُوْلُ اِلَّا اعْتَرٰىكَ بَعْضُ اٰلِهَتِنَا بِسُوْٓءٍ ؕ قَالَ اِنِّيْٓ اُشْهِدُ اللّٰهَ وَاشْهَدُوْٓا اَنِّيْ بَرِيْٓءٌ مِّمَّا تُشْرِكُوْنَ ﴿٥٤﴾

**किंबहुना आम्ही तर फक्त हेच म्हणतो की, तू आमच्या कोण्या उपास्याकडून वाईट प्रकारे, पछाडला गेला आहेस.**(२) **त्याने उत्तर दिले की, मी अल्लाहला साक्षी ठेवतो व तुम्हीही साक्षी रहा, की मी तर अल्लाहशिवाय सर्वांकडून अलिप्त आहे, ज्यांना तुम्ही सरकतदार ठरवीत आहात**(३) ﴿५४﴾

مِنْ دُوْنِهٖ فَكِيْدُوْنِيْ جَمِيْعًا ثُمَّ لَا تُنْظِرُوْنِ ﴿٥٥﴾

**त्या बरे, तर तुम्ही सर्व मिळून, माझ्याशी डावपेच लढवून घ्या; आणि मला जरा ही अवकाश देऊ नका.**(४) ﴿५५﴾

اِنِّيْ تَوَكَّلْتُ عَلَى اللّٰهِ رَبِّيْ وَرَبِّكُمْ ؕ مَا مِنْ دَآبَّةٍ اِلَّا هُوَ اٰخِذٌ بِنَاصِيَتِهَا ؕ اِنَّ رَبِّيْ عَلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿٥٦﴾

**माझा भरोसा फक्त अल्लाहतआलावरच आहे; जो माझा आणि तुम्हा सर्वांचा पालनकर्ता आहेस. जितके पण पायधारी आहेत, त्यांची शेंडी त्याच्याच**(५) **हातात आहे. खचित्‌च माझा पालनकर्ता बिलकुल खऱ्या मार्गावर आहे.**(६) ﴿५६﴾

فَاِنْ تَوَلَّوْا فَقَدْ اَبْلَغْتُكُمْ مَّآ اُرْسِلْتُ بِهٖٓ اِلَيْكُمْ ؕ وَيَسْتَخْلِفُ رَبِّيْ قَوْمًا غَيْرَكُمْ ۚ وَلَا تَضُرُّوْنَهٗ شَيْـًٔا ؕ اِنَّ رَبِّيْ عَلٰى كُلِّ شَيْءٍ حَفِيْظٌ ﴿٥٧﴾

**मग जर तुम्ही तोंड फिरवाल, तर फिरवा. मी तर तुम्हास तो संदेश पोहचवून चुकलो; जो देऊन मला, तुमच्याकडे पाठविण्यात आले होते.**(७) **माझा पालनकर्ता तुमच्या ठिकाणी, आणखी लोकांना आणून ठेवीन. आणि तुम्ही त्याचे काहीच बिघडवू शकणार**(८) **नाही. नि:संशय माझा पालनकर्ता, प्रत्येक वस्तूंचा संरक्षणकर्ता आहे.**(९) ﴿५७﴾

१) एक पैगंबर, प्रमाणे आणि पुरावे यांचे पूर्ण सामर्थ्य,आपल्या बरोबर बाळगतो. परंतु सूर्यप्रकाशांत डोळे बंद ठेवणाऱ्यांना, ते दिसत नाहीत. हूद (عليه السلام) च्या लोकांनी सुद्धा, याच उद्धटपणाचे प्रदर्शन करीत, म्हटले की, आम्ही प्रमाणाशिवाय, केवळ तुझ्या सागंण्यावरून, आपल्या उपास्यांना कसे सोडून द्यावे?

२) म्हणजे तू जो आमच्या उपास्यांना कमी लेखतो आणि त्यांच्याशी उद्धटपणा करतो, की, हे काही करू शकत नाही. असे वाटते की, आमच्या उपास्यानीच तुझ्या या उध्दटपणावर तुला काही करुन टाकले आहे. आणि तुझे डोके फिरून गेले आहे. जसे आज कालचे नांवापुरते मुसलमान, अशा प्रकारच्या भ्रमाचे बळी आहेत. जेव्हा त्यांना सांगण्यात येते की, हे मृतपावलेले लोक आणि बुजूर्ग, काही करू शकत नाहीत, तर हे म्हणतात की, त्यांच्या प्रतिष्ठेत उद्धटपणा आहे. आणि धोका आहे की, अशा प्रकारच्या उद्धटपणा करणाऱ्यांची कामे बिघडून जावीत.

३) म्हणजे मी या सर्व मूर्त्या आणि उपास्यांपासून अलिप्त आहे; आणि तुमची ही श्रद्धा की, त्यांनी मला काही करून टाकले आहे, एकदम चूक आहे. त्यांच्यात हे सामर्थ्यच नाही की, कोणाला नफा किंवा नुकसान पोहचवू शकतील. म्हणजे सबबी किंवा साधनांशिवाय.

४) आणि जर तुम्हास माझ्या गोष्टींवर विश्वास नाही, किंबहुना तुम्ही आपल्या या दाव्यात खरे आहात की, या मूर्ती काही करू शकतात, तर घ्या! मी तयार आहे. तुम्ही आणि तुमचे उपास्य सर्व मिळून, माझ्या विरूद्ध काही करून दाखवा.

५) म्हणजे ज्या व्यक्तीत्वाच्या हातांत प्रत्येक वस्तूंचा कब्जा, आणि हेर फेर करण्याचा अधिकार आहे, तेच व्यक्तीत्व आहे, जो माझा आणि तुमचा पालनकर्ता आहे. माझा भरोसा त्याचेवरच आहे. उद्देश्य या शब्दांनी, ह.हूद (عليه السلام) चा हा आहे की, ज्यांना तुम्ही, अल्लाहचा सरकतदार बनवून ठेवले आहे; त्यांच्यावर सुद्धा अल्लाहचाच कब्जा आणि दखल देण्याचा अधिकार आहे. अल्लाहतआला, यांचे बरोबर जे इच्छेल ते करू शकतो. ते कोणाचे काहीही करू शकत नाहीत.

६) म्हणजे तो, जो एकेश्वरवादाचे आवाहन करीत आहे, खचित्‌च हे आवाहनच सरळ मार्ग आहे. याच्यावर चालूनच मुक्ती आणि साफल्य, तुम्ही मिळवू शकता. आणि या सरळमार्गापासून तोंड फिरविणे आणि टाळाटाळ करणे, तबाह आणि बर्बाद होण्याला कारणीभूत आहे.

७) म्हणजे याच्यानंतर माझी जबाबदारी संपली आणि तुमच्यावर तर्क वादपूर्ण झाला.

८) म्हणजे तुम्हास नष्ट करून, तुमच्या जमिनी आणि इमल्यांचा, तो दुसऱ्यांना मालक बनवून देईल, तर तो असे करण्यावर सर्व समर्थ आहे. आणि तुम्ही त्याचे काहीही वाईट करू शकत नाही. किंबहुना तो आपल्या मर्जी आणि प्रयोजनाप्रमाणे, असे करीत रहातो.

९) खचित्‌च तो मला, तुमच्या चालबाजी आणि कट कारस्थानापासून सुद्धा, सुरक्षित ठेवेल. आणि शैतानी जाळ्यांपासून सुद्धा वाचवील. याचे शिवाय प्रत्येकसदाचरणी आणि दुराचरणींना, त्यांच्या कर्मांप्रमाणे, चांगले किंवा वाईटप्रतिफळ पण देईल.

وَلَمَّا جَآءَ اَمْرُنَا نَجَّيْنَا هُوْدًا وَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا مَعَهٗ بِرَحْمَةٍ مِّنَّا ۚ وَ نَجَّيْنٰهُمْ مِّنْ عَذَابٍ غَلِيْظٍ ﴿٥٨﴾

आणि जेव्हा आमचा हुकूम येऊन पोहचला, तेव्हा आम्ही हूद, आणि त्याच्या मुसलमान साथीदारांना, आपल्या खास दयेने सुटका दिली. आणि आम्ही त्या सर्वांना कडक शिक्षेपासून वांचवून घेतले.[१] ५८

وَتِلْكَ عَادٌ ۟ۙ جَحَدُوْا بِاٰيٰتِ رَبِّهِمْ وَعَصَوْا رُسُلَهٗ وَاتَّبَعُوْۤا اَمْرَ كُلِّ جَبَّارٍ عَنِيْدٍ ﴿٥٩﴾

हे होते 'आद' चे लोक, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या निशाण्यांना नाकारले; आणि त्याच्या पैगंबरांचा आज्ञाभंग[२] केला. आणि प्रत्येक शिरजोर आज्ञाभंजकाच्या हुकूमाचे अनुपालन केले.[३] ५९

وَاُتْبِعُوْا فِيْ هٰذِهِ الدُّنْيَا لَعْنَةً وَّيَوْمَ الْقِيٰمَةِ ؕ اَلَاۤ اِنَّ عَادًا كَفَرُوْا رَبَّهُمْ ؕ اَلَا بُعْدًا لِّعَادٍ قَوْمِ هُوْدٍ ﴿٦٠﴾

जगात सुद्धा त्यांच्यामागे शाप लावून देण्यात आला, आणि कयामतच्या दिवशीसुद्धा[४] पहा! आदच्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याला नाकारले. हूदचे लोक 'आद' वर शाप असो![५] ६०

وَاِلٰى ثَمُوْدَ اَخَاهُمْ صٰلِحًا ۘ قَالَ يٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ اِلٰهٍ غَيْرُهٗ ؕ هُوَ اَنْشَاَكُمْ مِّنَ الْاَرْضِ وَاسْتَعْمَرَكُمْ فِيْهَا فَاسْتَغْفِرُوْهُ ثُمَّ تُوْبُوْۤا اِلَيْهِ ؕ اِنَّ رَبِّيْ قَرِيْبٌ مُّجِيْبٌ ﴿٦١﴾

आणि 'समूद' च्या लोकांकडे, त्यांचा भाऊ 'सॉलेह' ला पाठविले.[६] त्याने म्हटले की, हे माझ्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची उपासना करा. त्याच्याशिवाय, अन्य कोणी तुमचा उपास्य नाही.[७] त्यानेच तुम्हाला जमिनीपासून निर्माण केले आहे.[८] आणि त्यानेच तुम्हाला जमिनीत वसविले आहे.[९] मग तुम्ही त्याच्याजवळ क्षमायाचना करा. आणि त्याच्याकडे पश्चात्ताप व्यक्त करा. नि:संशय माझा पालनकर्ता समीप आणि प्रार्थनांचा मान्य करणारा आहे. ६१

१) कडक शिक्षेने अभिप्रेत तोंच , 'अर्रीहुल अकीम' म्हणजे 'सोसाट्याचा वारा', ज्याच्याने ह.हूद عليه السلام चे लोक, आदला नष्ट करण्यात आले. आणि ह.हूद عليه السلام आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांना वांचवून घेण्यांत आले.

२) 'आद' कडे एक पैगंबर, ह.हुद عليه السلام लाच पाठविण्यात आले होते. परंतु येथे अल्लाहतआलाने म्हटले की, त्यांनी अल्लाहच्या पैगंबराचा आज्ञाभंग केला. याने एक तर हे स्पष्ट करण्याचा उद्देश आहे की, एक पैगंबराला नाकारणे हे जणू सर्व पैगंबरांना नाकारणे आहे. कारण की सर्व पैगंबरांवर ईमान आणणे आवश्यक आहे. अथवा अर्थ हा आहे की, हा समाज आपल्या कुफ्र आणि अहंकारात इतका पुढे जाऊन चुकला होता की, ह.हूद عليه السلام नंतर, या लोकांत अनेक पैगंबर जरी पाठविले असते, तर हे लोक त्या सर्वांना नाकारत राहिले असते; आणि त्यांच्यापासून बिलकुल ही आशा नव्हती की, कोणत्याही पैगंबरावर ईमान घेऊन आले असते.

३) म्हणजे अल्लाहच्या पैगंबरांना नाकारले, परंतु जे लोक अल्लाहच्या हुकूमांशी शिरजोरी करणारे आणि आज्ञाभंग करणारे होते; त्यांचे त्या लोकांनी (समाजाने) अनुकरण केले.

४) शापाचा अर्थ आहे, अल्लाहच्या दयेपासून दूर जाणे. चांगल्या कामापासून वंचित् राहणे, आणि लोकांपासून निर्भत्सना आणि अलग रहाणे (अलिप्त रहाणे) जगात हा शाप अशाप्रकारे की, ईमानवाल्यांमध्ये याचा उल्लेख नेहमी, निर्भत्सना आणि अलिप्ततेच्या स्वरूपात होईल. आणि कयामतमध्ये अशाप्रकारे की, अप्रतिष्ठा आणि अपमानाचा सामना करावा लागेल, आणि अल्लाहच्या शिक्षेत व्यस्त राहतील.

५) 'बुअद' चा हा शब्द रहमतपासून दूरी आणि शाप आणि नष्ट होण्याच्या अर्थाकरींता आहे. जसे की, याच्यापूर्वी सुद्धा खुलासा केला जाऊन चुकला आहे.

६) म्हणजे आम्ही समूदकडे पाठविले. हे लोक तबूक आणि मदीना, यांचे दर्म्यान, मदाइने सॉलेह (हिज्र) मध्ये वस्ती करून होते. आणि आदच्या लोकांनंतर झालेत. ह.सॉलेह عليه السلام ला येथे सुद्धा, समूदचा भाऊ म्हटले आहे; ज्याच्याने अभिप्रेत त्यांच्याच घराणे आणि कुटुंबातून एक माणूस होता. ज्याला काही ठिकाणी 'त्यांच्यातूनच पैगंबर' ने संबोधित केले गेले आहे.

७) ह.सॉलेह عليه السلام नी सुद्धा, आपल्या समाजाला एकेश्वरवादाचे आमंत्रण दिले; ज्याप्रमाणे की, सर्व पैगंबराची रीत राहिलेली आहे.

८) म्हणजे सुरवातीला तुम्हाला जमिनीपासून निर्माण केले. ते अशाप्रकारे की, तुमचे वडील ह.आदम عليه السلام ची निर्मिती मातीपासून झाली. आणि सर्व माणसे आदमच्या पाठीतून निर्माण झालेत. अशाप्रकारे जणू संपूर्ण मानवांची निर्मिती जमिनीपासून झाली. किंवा हा अर्थ आहे की, तुम्ही जे काही खाता, सर्व जमिनीतूनच निर्माण होते, आणि त्याच खाद्यातून ते वीर्य बनते, जे मातेच्या उदरात जाऊन, मानवाच्या अस्तित्वाला कारणीभूत होते.

९) म्हणजे तुमच्यात जमिनीवर वस्ती करून तिला आबाद करण्याचे कौशल्य आणि क्षमता निर्माण केली; ज्यामुळे तुम्ही राहण्यासाठी घरे बांधतात, खाद्यान्नासाठी शेती करतात, आणि दुसऱ्या जीवनावश्यक गरजा, प्राप्त करण्यासाठी, हाताने किंवा मशिनरीने काम घेतात.

قَالُوْا يٰصٰلِحُ قَدْ كُنْتَ فِيْنَا مَرْجُوًّا قَبْلَ هٰذَآ اَتَنْهٰىنَآ اَنْ نَّعْبُدَ مَا يَعْبُدُ اٰبَآؤُنَا وَاِنَّنَا لَفِيْ شَكٍّ مِّمَّا تَدْعُوْنَآ اِلَيْهِ مُرِيْبٍ ﴿٦٢﴾

**त्यांनी म्हटले, हे सॉलेह! याच्या पूर्वीतर आम्ही तुझ्यासंबंधी बऱ्याच आशा बाळगून होतो. काय तू आम्हास त्यांच्या उपासनेपासून मना करीत आहे, ज्यांची उपासना, आमचे वाडवडील करीत आले आहेत. आम्हाला तर त्या धर्मांत शंका आहे, ज्याकडे तू आम्हास बोलावित आहेस,[१] ६२**

قَالَ يٰقَوْمِ اَرَءَيْتُمْ اِنْ كُنْتُ عَلٰى بَيِّنَةٍ مِّنْ رَّبِّيْ وَاٰتٰىنِيْ مِنْهُ رَحْمَةً فَمَنْ يَّنْصُرُنِيْ مِنَ اللّٰهِ اِنْ عَصَيْتُهٗ فَمَا تَزِيْدُوْنَنِيْ غَيْرَ تَخْسِيْرٍ ﴿٦٣﴾

**त्याने उत्तर दिले की, माझ्या समाजबांधवांनो! जरा सांगा तर खरे, की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून, कोण्या ठोस प्रमाणावर असेल; आणि त्याने मला, आपल्या जवळची दया दिली असेल;[२] मग जर मी त्याची नाफरमानी केली,[३] तर कोण आहे, जो त्याच्या मुकाबल्यांत माझी मदत करेन? तुम्ही तर माझे नुकसानच वाढवित आहात.[४] ६३**

وَيٰقَوْمِ هٰذِهٖ نَاقَةُ اللّٰهِ لَكُمْ اٰيَةً فَذَرُوْهَا تَاْكُلْ فِيْٓ اَرْضِ اللّٰهِ وَلَا تَمَسُّوْهَا بِسُوْٓءٍ فَيَاْخُذَكُمْ عَذَابٌ قَرِيْبٌ ﴿٦٤﴾

**आणि हे माझ्या समाजबंधुंनो! ही अल्लाहची पाठविलेली उंटीण आहे; जो तुमच्या साठी एक चमत्कार आहे. आता तुम्ही तिला अल्लाहच्या भूमीत चरु द्या. आणि तिला कुठल्याही प्रकारे इजा पोहचवू नका. नाहीतर जलद येऊन पोहचणारी शिक्षा तुम्हास येऊन गाठेल.[५] ६४**

فَعَقَرُوْهَا فَقَالَ تَمَتَّعُوْا فِيْ دَارِكُمْ ثَلٰثَةَ اَيَّامٍ ذٰلِكَ وَعْدٌ غَيْرُ مَكْذُوْبٍ ﴿٦٥﴾

**तरी सुध्दा त्या लोकांनी त्या उंटीणीला मारुन टाकले. यावर सॉलेह ने म्हटले, की बरे! आता तुम्ही आपल्या घरात, तीन दिवसांपर्यंत राहून सवरुन घ्या. हा वायदा खोटा नाही.[६] ६५**

१) म्हणजे पैगंबर आपल्या लोकांत, चारित्र्य आणि कतृत्व, विश्वास आणि ईमानदारी यामध्ये लोकप्रिय असतो, म्हणून समाजाच्या त्याच्या संबंधी चांगल्या आशा असतात. या अनुषंगाने, ह. सॉलेह عليه السلام च्या लोकांनी पण त्यांना असे सांगितले. परंतु ऐकेश्वरवादाचे आमंत्रण देतांच, त्यांच्या आशेचे केंद्र , त्यांच्या डोळ्यांत खुपू लागले. आणि या धर्मांत शंका व्यक्त केली, ज्याकडे ह. सॉलेह عليه السلام त्यांना बोलवित होते. म्हणजे एकेश्वर वादाचा धर्म.

२) बय्यनतिन' ने अभिप्रेत, ते ईमान आणि भरोसा आहे, जे अल्लाहतआला पैगंबरांना देत असतो., आणि दयेने पैगंबरी. (अभिप्रेत आहे.) जसे की पूर्वी खुलासा होऊन चुकला आहे. याशिवाय बय्याना ने अभिप्रेत, ते चमत्कार पण आहेत, जे अल्लाहतआला आपल्या मर्जीने, पैगंबराच्या मार्फत, पैगंबराच्या मान्यता आणि समर्थनार्थ, जाहीर करवितो. हा तर्क आणि प्रमाण आणि पैंगबरी, जरी निश्चित आणि स्पष्ट केलेली होती, परंतु ह. सॉलेह عليه السلام नी येथे याला शंकेचा शब्द (जर) ने वर्णन केलेला आहे. तर हे वास्तविक, लोकांना संबोधित करण्याच्या अनुषंगाने आहे, कारण की ते शंकेत पडले होते. ह. सॉलेह عليه السلام ला काही शंका नव्हती.

३)आज्ञाभंगाने अभिप्रेत हे आहे की, जर मी तुम्हास सत्याकडे, आणि एका उपास्याच्या उपासने कडे, बोलाविणे सोडून देऊ, जसे की तुम्ही इच्छिता.

४) म्हणजे जर मी असे करील, तर तुम्ही मला काही फायदा तर पोहचवू शकत नाही. किंबहुना, अशाप्रकारे तुम्ही माझ्या नुकसानीत आणि घाट्यांतच वाढ कराल.

५) ही तीच उंटीण आहे, जी अल्लाहतआलाने त्यांच्या म्हणण्यानुसार, त्यांच्या डोळ्या देखत एक डोंगर किंवा एक चट्टानातून, काढून दाखवली. याच साठी तिला नाकतुल्लाह' (अल्लाहची उंटीण) म्हणण्यांत आले आहे. कारण की, ही निव्वळ अल्लाहच्या हुकुमानुसार, एक चमत्कार म्हणून, नेहमीच्या पध्दतीच्या विरुध्द, जाहीर झालेली होती. तिच्या बाबत त्यांना ताकीद दिली गेली होती की, तिला इजा पोहचवू नये; नाहीतर तुम्ही अल्लाहच्या शिक्षेत पकडले जाल.

६)परंतु त्या जालिमांनी या महान चमत्काराच्या नंतर सुध्दा, न फक्त ईमान आणण्यापासून पाठ फिरवली, किंबहुना अल्लाहच्या हुकूमाचा खुल्लमखुल्ला आज्ञाभंग करीत, तिला मारुन टाकले; ज्यानंतर त्यांना तीन दिवसांची सवलत देण्यात आली, की तीन दिवसानंतर तुम्हास शिक्षेद्वारे नष्ट करुन टाकण्यात येईल.

فَلَمَّا جَآءَ اَمْرُنَا نَجَّيْنَا صٰلِحًا وَّالَّذِيْنَ اٰمَنُوْا مَعَهٗ بِرَحْمَةٍ مِّنَّا وَمِنْ خِزْيِ يَوْمِئِذٍ ؕ اِنَّ رَبَّكَ هُوَ الْقَوِيُّ الْعَزِيْزُ ﴿٦٦﴾

मग जेव्हा आमचा हुकूम[१] येऊन पोहोचला, आम्ही सॉलेहला आणि त्याच्यावर ईमान आणणाऱ्यांना, आपल्या कृपेने, याच्या पासून सुध्दा आणि त्या दिवसाच्या फजितीपासून सुध्दा, वाचवून घेतले. खचित्‌च तुझा लपालनकर्ता बलवान आणि सामर्थ्यवान आहे. ६६

وَاَخَذَ الَّذِيْنَ ظَلَمُوا الصَّيْحَةُ فَاَصْبَحُوْا فِيْ دِيَارِهِمْ جٰثِمِيْنَ ﴿٦٧﴾ۙ

आणि ज्या लोकांनी अन्याय केला, त्यांना मोठया जोराच्या गर्जनेने येऊन गाठले;[२] मग तर ते आपल्या घरांत, बसल्या बसल्याच गतप्राण झाले.[३] ६७

كَاَنْ لَّمْ يَغْنَوْا فِيْهَا ؕ اَلَآ اِنَّ ثَمُوْدَا۟ كَفَرُوْا رَبَّهُمْ ؕ اَلَا بُعْدًا لِّثَمُوْدَ ﴿٦٨﴾

असे की जणू ते, तेथे कधी बसलेच नव्हते.[४] सावध व्हा की समूदच्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याला नाकारले. ऐकून घ्याः या समूदवाल्यांवर (अल्लाहचा) शाप आहे. ६८

وَلَقَدْ جَآءَتْ رُسُلُنَآ اِبْرٰهِيْمَ بِالْبُشْرٰى قَالُوْا سَلٰمًا ؕ قَالَ سَلٰمٌ فَمَا لَبِثَ اَنْ جَآءَ بِعِجْلٍ حَنِيْذٍ ﴿٦٩﴾

आणि आमचे पाठविलेले संदेष्टे, इब्राहीम जवळ खुषखबरी घेऊन पोंहचले;[५] आणि सलाम म्हटले.[६] त्यांनी पण उत्तर सलाम दिले आणि कुठल्याही प्रकारचा वेळ न घालवितां, गाईचे भाजलेले वासरु घेऊन आले[७] ६९

فَلَمَّا رَاٰۤ اَيْدِيَهُمْ لَا تَصِلُ اِلَيْهِ نَكِرَهُمْ وَاَوْجَسَ مِنْهُمْ خِيْفَةً ؕ قَالُوْا لَا تَخَفْ اِنَّآ اُرْسِلْنَآ اِلٰى قَوْمِ لُوْطٍ ﴿٧٠﴾ؕ

आता जेव्हा त्यांनी पाहिले की त्याचे हात पण त्याच्याकडे जात नाहीत; तर त्यांनी अपरिचित समजून, मनांतल्या मनांत त्यांना भिऊ लागले;[८] त्यांनी म्हटले, भिऊ नका, आम्ही तर लूतच्या लोकांकडे, पाठविलेले, आले आहोत.[९] ७०

وَامْرَاَتُهٗ قَآئِمَةٌ فَضَحِكَتْ فَبَشَّرْنٰهَا بِاِسْحٰقَ ۙ وَمِنْ وَّرَآءِ اِسْحٰقَ يَعْقُوْبَ ﴿٧١﴾

याची बायको जी (तेथे) उभी होती, तिने हसून दिले.[१०] तेव्हा आम्ही तिला इसहाकची आणि इसहाकनंतर याकूबची शुभ वार्ता दिली. ७१

قَالَتْ يٰوَيْلَتٰۤى ءَاَلِدُ وَاَنَا عَجُوْزٌ وَّهٰذَا بَعْلِيْ شَيْخًا ؕ اِنَّ هٰذَا لَشَيْءٌ عَجِيْبٌ ﴿٧٢﴾

ती म्हणू लागली की, हाय! हाय!! माझ्या येथे संतती कशी होऊ शकते? मी स्वत: म्हातारी, आणि हे माझे पतीसुध्दा, फार मोठ्या वयाचे आहेत, ही तर खचित्‌च, फार मोठ्या आश्चर्याची गोष्ट[११] आहे. ७२

قَالُوْۤا اَتَعْجَبِيْنَ مِنْ اَمْرِ اللّٰهِ رَحْمَتُ اللّٰهِ وَبَرَكٰتُهٗ عَلَيْكُمْ اَهْلَ الْبَيْتِ ؕ اِنَّهٗ حَمِيْدٌ مَّجِيْدٌ ﴿٧٣﴾

देवदुतांनी म्हटले, काय तू अल्लाह सामर्थ्याशी आश्चर्य करते आहे?[१२] तुमच्यावर हे या घराण्याच्या लोकांनो! अल्लाह्‌ची दया (रहमत) आणि त्याची बरकत अवतरीत होवोत[१३] नि:संशय अल्लाह् स्तुतीस पात्र आणि मोठा वैभवशाली आहे. ७३

فَلَمَّا ذَهَبَ عَنْ اِبْرٰهِيْمَ الرَّوْعُ وَجَآءَتْهُ الْبُشْرٰى يُجَادِلُنَا فِيْ قَوْمِ لُوْطٍ ﴿٧٤﴾ؕ

जेव्हा इब्राहिमाची भीती नाहीशी झाली, आणि त्याला शुभवर्तमान पण मिळून गेले, तेव्हा आमच्याशी लूतच्या लोकांबाबत झगडू लागला[१४] ७४

१) याच्याने अभिप्रेत तीच शिक्षा आहे जी वायद्याप्रमाणे , चवथ्या द्विवशी आली. आणि ह. सॉलेह عليه السلام आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांशिवाय , सर्वांना नष्ट करुन टाकण्यात आले.

२) ही शिक्षा सैहतून' (आरोळी, जोराची गर्जना) च्या स्वरुपात आली. काहींच्या जवळ ही ह. जिब्रईल عليه السلام ची आरोळी होती. आणि काहींच्या जवळ, आकाशातून आली होती. ज्याच्याने त्यांची हृदये, छिन्न विछिन्न होऊन गेली. आणि त्यांचा मृत्यु घडून आला. याच्या नंतर किंवा याच्या बरोबरच, भूकंप पण (रज्‌फतून) आला. ज्याने सर्व काही तहसनहस करुन टाकले. जसे सू. आअराफ आ. ७८ मध्ये, 'फअखजत हूमुर् रजफतो'' चे शब्द आहेत.

३) ज्या प्रमाणे पक्षी मेल्यानंतर, जमिनीवर माती मध्ये पडलेला असतो, अशाच, प्रकारे, ते मृत्यू पाऊन, तोंडावर जमिनीवर पडून राहिलेत.

४) यांची वस्ती किंवा हे स्वत: , चुकीच्या अक्षराप्रमाणे, पुसून टाकण्यात आलेत; जणू ते कधी येथे वसलेच नव्हते.

५) हा वास्तविक, ह. लूत عليه السلام आणि त्यांच्या लोकांच्या, गोष्टीचा एक भाग आहे. ह. लूत عليه السلام, ह. इब्राहीम عليه السلام चे चुलत भाऊ होते. लूत عليه السلام ची वस्ती मृत समुद्राच्या आग्नेयात होती. आणि ह. इब्राहीम عليه السلام पॅलेस्टाईन मध्ये राहत होते. जेव्हा लूतच्या लोकांना नष्ट करण्याचा निर्णय करुन घेण्यांत आला, तर त्यांच्याकडे देवदूत पाठविण्यात आलेत. काही म्हणतात की हे तीन देवदूत होते. जिब्राईल, मिकाईल आणि इसराफील عليه السلام काही म्हणतात की, यांची संख्या नऊ, आणि काहीच्या जवळ, अकरा होती. हे देवदूत लूतच्या लोकांजवळ जात असतांना रस्त्यांत इ. इब्राहीम عليه السلام च्या जवळ थांबले; आणि त्यांना पुत्राचे शुभ वर्तमान दिले.

६) म्हणजे सल्लम्ना अलैका सलामन'' आम्ही आपणास सलाम सांगत आहोत.

७) ह. इब्राहीम عليه السلام मोठे अतिथ्यशील होते; ते हे समजू शकले नाही की हे देवदूत आहेत; जे मानवी रुपात आले आहेत. आणि खाण्यापिण्याला असमर्थ आहेत. किंबहुना त्यांनी त्यांना, पाहुणे समजले. ताबडतोब पाहुण्यांच्या आदर अतिथ्यासाठी, भाजलेले वासरु आणून त्यांच्यासमोर ठेवून दिले. म्हणजे ह. इब्राहीम عليه السلام नी, वासरुआणण्यात उशीर केला नाही. याच्यात काही पाहुणचाराच्या शिष्टाचाराचे वर्णन आहे.

८) ह.इब्राहीम عليه السلام नी जेव्हा पाहिले की त्यांचे हात, जेवणाकडे उचललेच जात नाही, तर त्यांना भीती वाटली. त्यांच्याकडेही ही गोष्ट मशहूर होती की, आलेले पाहुणे, जर पाहुणचार घेत नसले, तर समजण्यात येत असे की, आलेले पाहुणे काही चांगल्या इराद्याने आलेले नाहीत. याच्याने हे पण ठाऊक झाले की, अल्लाहच्या पैगंबरांना अदृष्टाचे ज्ञान नसते. जर इब्राहीम عليه السلام अदृष्टाचे ज्ञाते असते, तर भाजलेले वासरूंपण आणले नसते; आणि त्यांच्यापासून त्यांना भीतीपण वाटली नसती.

९) ही भीती देवदुतांना जाणवली. एक तर अशा लक्षणांनी, जे अशा प्रसंगी माणसाच्या चेहऱ्यावर दिसून येतात; किंवा आपल्या संभाषणाने, ह.इब्राहीम عليه السلام नी या भीती ला जाहीर केले. जसा की दुसऱ्या ठिकाणी खुलासा आहे. ''आम्हांस तर तुमच्यापासून भीती वाटते.'' (सू. हिज्र-५२) म्हणून देवदुतांनी सांगितले भिऊ नका. आपण जे समजत आहात, आम्ही ते नाहीत. किंबहुना अल्लाहचे पाठविलेले आहोत. आणि आम्ही लूतच्या लोकांकडे जात आहोत.

१०) ह.इब्राहीम عليه السلام ची पत्नी का हसली? काही म्हणतात की, लूतच्या लोकांच्या फिसादखोरीला ती पण जाणत होती. त्यांच्या नष्ट करण्याच्या बातमीने त्यांना आनंद वाटला. काही म्हणतात की यासाठी तिला हसू आले की, पहा! आकाशांतून त्यांना नष्ट करण्याचा निर्णय होऊन चुकला आहे. आणि हे लोक यापासून गफलतीत आहे. आणि काही म्हणतात की, त्या हंसण्याचा संबंध त्या शुभ समाचाराशी आहे, जे देवदुतांनी त्या वृद्ध दांपत्याला दिले. वल्लाह् अअलम!

११) ही पत्नी ह. सारा होती, जी स्वत:पण म्हातारी होती, आणि तिचे पती ह.इब्राहीम عليه السلام सुद्धा म्हातारे होते, म्हणून आश्चर्य वाटणे स्वाभाविक होते. जे त्यांच्याकडून जाहीर झाले.

१२) हे विचारणे नाकारण्यासाठी आहे. म्हणजे तू अल्लाहच्या निअतीवर (कजाव कदर) कशा प्रकारे आश्चर्य व्यक्त करते आहे, जेव्हा की त्याच्यासाठी कुठलीही गोष्ट कठीण नाही. तसेच तो, कोणत्याही बाबतीत लाचार नाही. तो तर जे इच्छेल त्याच्या शब्द 'कुन' (होऊन जा.) नेच त्वरीत अस्तित्वात येऊन जाते.

१३) ह.इब्राहीम عليه السلام च्या सन्माननीय पत्नीला, येथे देवदुतांनी 'अहले बैत' ने संबोधित केले. आणि दुसरे त्यांच्याकरतां, संबोधन करतांना अलैकुम चा सेगा उपयोगात आणला. ज्याच्याने एक गोष्ट तर ही सिद्ध झाली की, 'अहले बैत' मध्ये सर्वांत प्रथम माणसाची पत्नी शामील असते जसे की, सू.अहजाब आ.३३ मध्ये अल्लाहतआलाने रसूलुल्लाह ﷺ च्या पवित्र पत्न्यांना पण 'अहले बैत' म्हटले आहे.

१४) या झगड्याने अभिप्रेत, हे आहे की, ह.इब्राहीम عليه السلام नी देवदुतांना म्हटले ज्या वस्तीला तुम्ही नष्ट करण्यासाठी जात आहात, त्याच्यात ह.लूत عليه السلام पण आहेत. ज्यावर देवदुतांनी सांगितले की, ''आम्हास ठाऊक आहे की, ह.लूत عليه السلام पण तेथे राहतात. परंतु आम्ही त्यांना आणि त्यांच्या घरवाल्यांना, त्यांची पत्नी सोडून वांचवून घेऊ.'' (सू. अन्कबूत-३२)

إِنَّ إِبْرَٰهِيمَ لَحَلِيمٌ أَوَّٰهٌ مُّنِيبٌ ﴿٧٥﴾

खचित्‌च इब्राहीम हे फारच सौम्य, कनवाळू आणि अल्लाह्‌कडे वळणारे होते. (७५)

يَٰٓإِبْرَٰهِيمُ أَعْرِضْ عَنْ هَٰذَآ ۖ إِنَّهُۥ قَدْ جَآءَ أَمْرُ رَبِّكَ ۖ وَإِنَّهُمْ ءَاتِيهِمْ عَذَابٌ غَيْرُ مَرْدُودٍ ﴿٧٦﴾

हे इब्राहीम! या विचाराला सोडून द्या. आपल्या पालनकर्त्याचा हुकूम येऊन पोंहचला आहे, आणि यांच्यावर परत न घेतली जाणारी शिक्षा, अवश्य येणार आहे. [१] (७६)

وَلَمَّا جَآءَتْ رُسُلُنَا لُوطًا سِىٓءَ بِهِمْ وَضَاقَ بِهِمْ ذَرْعًا وَقَالَ هَٰذَا يَوْمٌ عَصِيبٌ ﴿٧٧﴾

जेव्हांआमचे पाठविलेले देवदूत, लूतजवळ पोंहोचले, तर ते त्यांच्यामुळे फार काळजीत पडले; आणि मनांतल्या मनांत कुढुंलागले; आणि म्हणू लागले आजचा दिवस, फारच संकटाचा दिवस आहे. [२] (७७)

وَجَآءَهُۥ قَوْمُهُۥ يُهْرَعُونَ إِلَيْهِ وَمِن قَبْلُ كَانُوا۟ يَعْمَلُونَ ٱلسَّيِّـَٔاتِ ۚ قَالَ يَٰقَوْمِ هَٰٓؤُلَآءِ بَنَاتِى هُنَّ أَطْهَرُ لَكُمْ ۖ فَٱتَّقُوا۟ ٱللَّهَ وَلَا تُخْزُونِ فِى ضَيْفِىٓ ۖ أَلَيْسَ مِنكُمْ رَجُلٌ رَّشِيدٌ ﴿٧٨﴾

आणि त्याचे लोक पळत पळत, त्याचे जवळ येऊन पोंहचले;[३] ते तर पहिल्यापासून, कुकृत्यात व्यस्त होते. [४] लूतने म्हटले हे समाज बांधवांनो! या आहेत माझ्या मुली; ज्या तुमच्या करीता फारच चोख्या आहेत.[५] अल्लाहला भ्या, आणि मला माझ्या पाहुण्यामध्ये फजीत करू नका. काय तुमच्यातून एक पण भला माणूस नाही?[६] (७८)

१) हे देवदुतांनी ह.इब्राहीम عليه السلام ला म्हटले की, या वादविवादाचा आणि झगड्याचा काही उपयोग नाही, याला सोडा! अल्लाहचा तो हुकूम (नष्ट करण्याचा) येऊन चूकला आहे. जो अल्लाहजवळ त्यांच्या प्रारब्धांत होता. आणि आता ही शिक्षा कोणाच्या झगड्याने थांबणार नाही, व कोणाच्या प्रार्थनेने टळणार नाही.

२) ह लूत عليه السلام च्या या फार काळजीचे कारण, भाष्यकारांनी हे लिहिले आहे की, हे देवदूत दाढीमिशा नसलेल्या, नवतरूणाच्या रूपात आले होते; ज्यामुळे ह.लूत عليه السلام ला आपल्या लोकांच्या वाईट सवयीला डोळ्यांसमोर ठेवून, फारच धोका जाणवला; कारण की त्यांना या गोष्टीची कल्पना नव्हती की, आलेले नवतरूण, पाहुणे नाहीत, किंबहुना अल्लाहचे पाठविलेले देवदूत आहेत; जे या लोकांना नष्ट करण्यासाठीच आले आहेत.

३) काही सहाबांच्या म्हणण्यानुसार असे (आसार) आहे की, ह.लूत عليه السلام च्या पत्नीने (जी काफिर होती) आपल्या लोकांना, या स्वरूप सुंदर नवतरूणांच्या येण्याची बातमी दिली. जी ऐकूण ते आपोआप पळत पळत आलेत. (तफसीर तिबरी)

४) जेव्हा लवंडे बाजीच्या या रोग्यांना ठाऊक झाले की, काही कोवळे नव जवान, ह.लूत عليه السلام च्या घरी आलेले आहेत, तर पळत पळत आले, आणि त्यांना आपल्याबरोबर घेऊन जाण्याचा आग्रह धरला की, त्यांच्याकडून आपली, कामवासनेची इच्छापूर्ती करावी.

५) म्हणजे तुम्हास जर लैंगिक इच्छेचे समाधान हवे आहे, तर त्याच्यासाठी माझ्या या मुलीपण उपस्थित आहेत. ज्यांच्याशी तुम्ही लग्न करून घ्या, आणि आपला उद्देश्य पुरा करून घ्या. या तुमच्यासाठी सर्व प्रकारे चांगल्या आहेत. काहींनी म्हटले आहे की, 'बनात' ने अभिप्रेत सामान्य स्त्रीया आहेत. आणि त्यांना आपल्या मुली यासाठी म्हटले आहे की, पैगंबर आपल्या उम्मतसाठी बापासारखा असतो. अर्थ हा आहे की, या कामासाठी, स्त्रीया उपस्थित आहेत, यांचेशी लग्न करा आणि आपला उद्देश्य पूर्ण करा! (इब्ने कसीर)

६) म्हणजे माझ्या घरी आलेल्या पाहुण्यांशी अत्याचार आणि जबरदस्ती करून मला फजीत करू नका. काय तुमच्यातून असा एक सुद्धा माणूस समजुतदार नाही जो यजमानांची कर्तव्ये आणि त्याच्या नाजुकतेला समजू शकेल? आणि तुम्हाला आपल्या वाईट इरादयांपासून रोकू शकेल? ह.लूत عليه السلام नी या सर्व गोष्टी या आधारावर केल्या की ते या देवदुतांना खरोखरच नवजवान प्रवासी आणि पाहुणेच समजत राहिले. म्हणून ते अनिवार्य प्रकारे, त्यांचे संरक्षण, आणि आपली इज्जत आणि प्रतिष्ठा यासाठी आवश्यक समजत राहिले. जर त्यांना ठाऊक झाले असते, किंवा त्यांना अदृष्टाचे ज्ञान असते; तर उघड गोष्ट आहे की, तर त्यांना ही काळजी मुळीच वाटली नसती, जी त्यांना वाटली; आणि ज्याचे चित्रण कुरआन मजीदने येथे केले आहे.

قَالُوْا لَقَدْ عَلِمْتَ مَا لَنَا فِيْ بَنٰتِكَ مِنْ حَقٍّ ۚ وَاِنَّكَ لَتَعْلَمُ مَا نُرِيْدُ ﴿٧٩﴾

त्यांनी उत्तर दिले की, तू चांगल्या प्रकारे जाणतोस की, आम्हाला तर तुझ्या मुलीवर काही हक्क नाही. आणि तू आमच्या खऱ्या इच्छेला चांगल्या प्रकारे ओळखतो.[१] (७९)

قَالَ لَوْ اَنَّ لِيْ بِكُمْ قُوَّةً اَوْ اٰوِيْۤ اِلٰى رُكْنٍ شَدِيْدٍ ﴿٨٠﴾

लूत ने म्हटले जर मला तुमच्या सामन्याची ताकद असती किंवा मी कोण्या जबरदस्त आश्रय स्तंभाचा आश्रय घेतला असता[२] (८०)

قَالُوْا يٰلُوْطُ اِنَّا رُسُلُ رَبِّكَ لَنْ يَّصِلُوْۤا اِلَيْكَ فَاَسْرِ بِاَهْلِكَ بِقِطْعٍ مِّنَ الَّيْلِ وَلَا يَلْتَفِتْ مِنْكُمْ اَحَدٌ اِلَّا امْرَاَتَكَ ؕ اِنَّهٗ مُصِيْبُهَا مَاۤ اَصَابَهُمْ ؕ اِنَّ مَوْعِدَهُمُ الصُّبْحُ ؕ اَلَيْسَ الصُّبْحُ بِقَرِيْبٍ ﴿٨١﴾

आता देवदूत म्हणाले की हे लूत! आम्ही तुझ्या पालनकर्त्याचे पाठविलेले आहोत. अशक्य आहे की, हे तुझ्यापर्यंत पोहचून जातील. बस! तू आपल्या घरवाल्यांना घेऊन, काही रात्र शिल्लक असता, निघून जा. तुमच्यातून कोणीही मागे वळून सुद्धा पाहू नये. फक्त तुझ्या पत्नी शिवाय; यासाठी की, तिला पण तेच मिळणार आहे, जे या सर्वांना मिळेल. खचितच् त्यांच्या वायद्याची वेळ सकाळ आहे. तर काय सकाळ जवळ नाही?[३] (८१)

فَلَمَّا جَآءَ اَمْرُنَا جَعَلْنَا عَالِيَهَا سَافِلَهَا وَاَمْطَرْنَا عَلَيْهَا حِجَارَةً مِّنْ سِجِّيْلٍ ۙ مَّنْضُوْدٍ ﴿٨٢﴾

मग जेव्हा आमचा हुकूम येऊन पोहचला, आम्ही या वस्तीच्या वरच्या भागाला तिचा खालचा भाग करून टाकला आणि तिला छिन्न विछिन्न करून टाकले आणि तिच्यावर कंकर मातीच्या पक्क्या दगडांचा वर्षाव केला. जे थरावर थर होते. (८२)

مُّسَوَّمَةً عِنْدَ رَبِّكَ ؕ وَمَا هِيَ مِنَ الظّٰلِمِيْنَ بِبَعِيْدٍ ﴿٨٣﴾

तुझ्या पालनकर्त्याकडून खुण केलेले होते. आणि ते या जालीमापासून, काहीच दूर नव्हते[४] (८३)

१) म्हणजे एक योग्य आणि स्वाभाविक पद्धतीला, त्यांनी बिलकुल रद्द करून टाकले. आणि अनैसर्गिक कृत्य, आणि निर्लज्जतेवर त्यांनी आग्रह धरला. ज्याच्याने कल्पना केली जाऊ शकते की ते लोक आपल्या या निर्लज्जतेच्या, घाणेरड्या संवयीमध्ये किती पुढे जाऊन चुकले होते. आणि कशाप्रकारे आंधळे होऊन गेले होते.

२) शक्तीने आपले बाहुबल, आणि आपल्या शस्त्र सामुग्रीचे सामर्थ्य, किंवा संततीची शक्ती अभिप्रेत आहे. आणि मजबूत आश्रयाने घराणे, कुटुंब किंवा या प्रकारचा कोणी मजबूत सहारा, अभिप्रेत आहे. म्हणजे फारच असहाय्य अवस्थेत इच्छा करतात की, माझ्याजवळ कोणी सामर्थ्य असते किंवा कोण्या घराण्याचे किंवा कुटुंबाचा आश्रय असता किंवा त्याची मदत मला प्राप्त झाली असती, तर आज मला पाहुण्यामुळे, ही फजिती आणि अप्रतिष्ठा झाली नसती. मी या बदमाषांना निपटून घेतले असते. आणि पाहुण्यांचे संरक्षण केले असते. ह.लूत عليه السلام ची ही आकांक्षा, अल्लाहतआलावर भरोश्याच्या विरूद्ध नाही. किंबहुना उघड साधनांप्रमाणे आहे. आणि अल्लाहवर भरोशाचा खरा भावार्थ पण हाच आहे की, प्रथम सर्व उघड साधने आणि साहित्य, उपयोगात आणले जावेत. आणि मग अल्लाहवर भरोसा केला जावा. हा भरोश्याचा फारच चुकीचा अर्थ आहे की, हातपाय बांधून बसून रहा, आणि म्हणा की, आमचा भरोसा अल्लाहवर आहे. यासाठी ह.लूत عليه السلام नी जे काही म्हटले, उघड साधनांच्या अनुषंगाने, बिलकुल योग्य सांगितले. ज्याने ही गोष्ट ठाऊक झाली की, अल्लाहचा पैगंबर ज्याप्रमाणे अदृष्टाचा ज्ञाता नसतो, त्याप्रमाणे तो सर्व अधिकार प्राप्त पण नसतो. (जसे की आजकाल लोकांनी ही श्रद्धा बनवून ठेवली आहे.) जर पैगंबराला जगात, अधिकार प्राप्त असते, तर खचितच् ह.लूत عليه السلام नी आपल्या असहाय्यतेला, आणि या आकांक्षेला जाहीर केले नसते, जी त्यांनी वरील शब्दात व्यक्त केली.

३) जेव्हा देवदुतांनी, ह.लूत عليه السلام ची असहाय्यता, आणि त्यांच्या लोकांच्या शिरजोरीला प्रत्यक्ष पाहून घेतले, तर म्हणाले, हे लुत! घाबरण्याची आवश्यकता नाही. आमच्यापर्यंत तर काय, आता ते तुझ्यापर्यंत सुद्धा पोहचू शकत नाही. आता रात्रीच्या एका भागात, पत्नीच्या शिवाय, आपल्या घरवाल्यांना घेऊन येथून निघून जा! सकाळ होताच या वस्तीला नष्ट करून टाकण्यात येईल.

४) या आयतमध्ये 'ही' याचा मर्जा, काही भाष्यकारांजवळ, ते खुणा केलेले पक्के दगड आहेत, जे यांच्यावर वर्षविण्यात आले. आणि काहींच्या जवळ, या चा मर्जा त्या वस्त्या आहेत, ज्या नष्ट करण्यांत आल्या, आणि ज्या सीरिया आणि मदीनेच्या दर्म्यान होत्या. आणि जालीमांनी अभिप्रेत, मक्केचे मुशरिक आणि दुसरे खोटे ठरविणारे आहेत. उद्देश्य त्यांना भिवविणे, आहे. की तुमचा परिणाम सुद्धा तसा होऊ शकतो, ज्याने मागील समूहांना बळी पडावे लागेल.

وَ اِلٰى مَدْيَنَ اَخَاهُمْ شُعَيْبًا ؕ قَالَ يٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ اِلٰهٍ غَيْرُهٗ ؕ وَلَا تَنْقُصُوا الْمِكْيَالَ وَالْمِيْزَانَ اِنِّيْۤ اَرٰىكُمْ بِخَيْرٍ وَّاِنِّيْۤ اَخَافُ عَلَيْكُمْ عَذَابَ يَوْمٍ مُّحِيْطٍ ﴿۸۴﴾

**आणि आम्ही मदयनवाल्यांकडे,[१] त्यांचा भाऊ शोएबला पाठविले त्याने म्हटले हे माझ्या लोकांनो! अल्लाहची उपासना करा; त्याच्याशिवाय तुमचा अन्य कोणी उपास्य नाही. आणि तुम्ही मापातोलांत पण कमी करू नका.[२] मी तर तुम्हाला सुसंपन्न अवस्थेत पाहतो.[३] आणि मला तर तुम्हांला घेरून घेणाऱ्या दिवसाच्या शिक्षेची भीती(पण) वाटते[४]** ﴿۸۴﴾

وَيٰقَوْمِ اَوْفُوا الْمِكْيَالَ وَالْمِيْزَانَ بِالْقِسْطِ وَلَا تَبْخَسُوا النَّاسَ اَشْيَآءَهُمْ وَلَا تَعْثَوْا فِى الْاَرْضِ مُفْسِدِيْنَ ﴿۸۵﴾

**हे माझ्या लोकांनो! माप तोल न्यायाने पूर्ण पूर्ण करा. लोकांना त्यांच्या वस्तू कमी देऊ नका.[५] आणि जमिनीवर फिसाद आणि बिघाड फैलावू नका.[६]** ﴿۸۵﴾

بَقِيَّتُ اللّٰهِ خَيْرٌ لَّكُمْ اِنْ كُنْتُمْ مُّؤْمِنِيْنَ ۚ وَمَاۤ اَنَا عَلَيْكُمْ بِحَفِيْظٍ ﴿۸۶﴾

**अल्लाहतआलाचा हलाल केलेला नफा, तुमच्यासाठी फारच उत्तम आहे; जर तुम्ही ईमानदार आहात.[७] मी तुमच्यावर देखरेख करणारा नाही.[८]** ﴿۸۶﴾

१) मद्‌यनच्या तपशीलासाठी, पहा सू.आअराफ आ.८५ चा समास-५

२) एकेश्वरवादाचे आमंत्रण दिल्यानंतर, या लोकात जी ठळक चारीत्र्य विषयक वाईट गोष्ट, मापा तोलात कमी देणेची होती; यापासून त्यांना मना केले. त्यांची रीत अशी बनून चुकली होती, की, जेव्हा यांचे जवळ कोणी विक्रेता आपली वस्तू घेऊन येत असे, तेव्हा त्याच्याकडून मापातोलांत जास्त वस्तू घेत. आणि जेव्हा कोणा घेणाऱ्याला, कोणी वस्तू विकत, तेव्हा मापात पण कमी करून देत, आणि तोलातसुद्धा दांडी मारून देत.

३) हे त्या मना करण्याचे कारण आहे की, जेव्हा अल्लाहतआला तुमच्यावर आपली कृपा करीत आहे; आणि त्याने तुम्हास सुसंपन्नतेने, आणि धनसंपत्ती देऊन ठेवली आहे; तर तुम्ही हा निंदनीय व्यवहार का करता?

४) हे दुसरे कारण आहे की, जर तुम्ही, या व्यवहारापासून परावृत्त झाला नाहीत, तर भय आहे की, कयामतच्या दिवशी, शिक्षेपासून तुम्ही वांचू शकणार नाही. घेरून घेणाऱ्या दिवसाने अभिप्रेत कयामतचा दिवस आहे; की त्यादिवशी कोणी गुन्हेगार, अल्लाहच्या धरपकडीपासून वांचू शकणार नाही; तसेच पळून कोठे लपू शकणार नाही.

५) आता ताकीद म्हणून, त्यांना न्यायासह पूर्ण मापातोलाचा हुकूम देण्यात येत आहे. आणि लोकांना वस्तू कमी करून देण्यास मनाई करण्यात आली आहे. कारण की अल्लाहतआलाजवळ हा पण मोठा अपराध आहे. आणि अल्लाहतआलाने एका संपूर्ण अध्यायात या अपराधाचा वाईटपणा आणि तिरस्कारणीयता आणि त्याची पारलौकीक शिक्षा वर्णन करण्यात आली आहे. ''मुतफ्फिफीन'' करता बर्बादी आहे. हे ते लोक आहेत, की जेव्हा लोकांकडून मोजून घेता, तेव्हा पूर्ण घेतात. आणि जेव्हा दुसऱ्यांना मापाने किंवा तोलाने देतात, तेव्हा कमी करून देतात'' (सू.मुत्‌फ्फिफीन)

६) अल्लाहच्या आज्ञाभंगाने, विशेषत: ज्यांचा संबंध लोकांच्या हक्कांशी असेल, जसा येथे मापा तोलात कमी जास्तीचा आहे. जमिनीवर खचित्‌च फसाद आणि बिघाड निर्माण होतो. ज्यापासून त्यांना मना करण्यांत आले. म्हणून लोकांच्या हक्कांना अदा करणे पण आवश्यक आहे.

७) 'बकीय्यतुल्लाह्' ने अभिप्रेत, तो नफा आहे, जो मापा तोलांत कुठल्याही प्रकारची कमी केल्याशिवाय, ईमानदारीने विक्री केल्यानंतर, प्राप्त व्हावा. कारण की, हा हलाल आणि चोखा आहे; आणि भलाई आणि बरकत पण याच्यांतच आहे; म्हणून अल्लाहचा बकीय्या, असे त्याला म्हणण्यात आले आहे.

८) म्हणजे मी तुम्हास फक्त प्रचार करू शकतो. आणि तो अल्लाहच्या हुकूमाने करीत आहे. परंतु वाईट गोष्टीपासून तुम्हांस थांबवून देईन किंवा याच्यावर शिक्षा देईन, हे माझ्या अधिकारांत नाही. या दोन्ही गोष्टींचा अधिकार फक्त अल्लाहतआलाजवळ आहे.

قَالُوا يَا شُعَيْبُ أَصَلَاتُكَ تَأْمُرُكَ أَنْ نَتْرُكَ مَا يَعْبُدُ آبَاؤُنَا أَوْ أَنْ نَفْعَلَ فِي أَمْوَالِنَا مَا نَشَاءُ ۖ إِنَّكَ لَأَنْتَ الْحَلِيمُ الرَّشِيدُ ٨٧

त्यांनी उत्तर दिले की, हे शोएब! काय तुझी उपासना (१) तुला हाच हुकूम देते की, आम्ही आपल्या आईवडीलांच्या उपास्यांना सोडून द्यावे; आणि आमच्या मालात, जे काही इच्छू, त्याचे करणे पण सोडून द्यावे? (२) तू तर मोठाच सौम्य आणि सद्व्यवहारी माणूस आहेस! (३) ८७

قَالَ يَا قَوْمِ أَرَأَيْتُمْ إِنْ كُنْتُ عَلَىٰ بَيِّنَةٍ مِنْ رَبِّي وَرَزَقَنِي مِنْهُ رِزْقًا حَسَنًا ۚ وَمَا أُرِيدُ أَنْ أُخَالِفَكُمْ إِلَىٰ مَا أَنْهَاكُمْ عَنْهُ ۚ إِنْ أُرِيدُ إِلَّا الْإِصْلَاحَ مَا اسْتَطَعْتُ ۚ وَمَا تَوْفِيقِي إِلَّا بِاللَّهِ ۚ عَلَيْهِ تَوَكَّلْتُ وَإِلَيْهِ أُنِيبُ ٨٨

त्यांनी म्हटले हे माझ्या लोकांनो! जरा पहातर, की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून, उघड प्रमाणे घेऊन आलो आहे, आणि त्याने मला आपल्या जवळून उत्कृष्ट रोजी देऊन ठेवली (४) आहे; माझा हा मुळीच इरादा नाही की, तुमचा विरोध करून, त्या गोष्टीकडे वळून जावे, ज्यापासून तुम्हांस मी मना करीत (५) आहे. माझा इरादा तर फक्त, आपल्या कुवतीप्रमाणे सुधारणा करण्याचा (६) आहे. माझी कार्य क्षमता फक्त अल्लाहच्याच मदतीने (७) आहे. त्याच्यावरच माझा भरोसा आहे; आणि त्याच्याचकडे मी (आपल्याला) वळवितो ८८

وَيَا قَوْمِ لَا يَجْرِمَنَّكُمْ شِقَاقِي أَنْ يُصِيبَكُمْ مِثْلُ مَا أَصَابَ قَوْمَ نُوحٍ أَوْ قَوْمَ هُودٍ أَوْ قَوْمَ صَالِحٍ ۚ وَمَا قَوْمُ لُوطٍ مِنْكُمْ بِبَعِيدٍ ٨٩

हे माझ्या समाजबांधवांनो! कोठे असे होऊ नये, की माझ्या विरोधात जाऊन, या शिक्षांना तुम्ही पात्र ठरून जावेत; जे नूहच्या लोकांना, हूदच्या लोकांना, आणि सॉलेहच्या लोकांना पोंहचल्या आहेत. आणि लूतचे लोक तर तुमच्यापासून काही दूर नाहीत (८) ८९

وَاسْتَغْفِرُوا رَبَّكُمْ ثُمَّ تُوبُوا إِلَيْهِ ۚ إِنَّ رَبِّي رَحِيمٌ وَدُودٌ ٩٠

तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे क्षमायाचना करा. आणि त्याला शरण जा. विश्वास ठेवा की, माझा पालनकर्ता, दयाळू आणि अतिप्रेमळ आहे. ९०

قَالُوا يَا شُعَيْبُ مَا نَفْقَهُ كَثِيرًا مِمَّا تَقُولُ وَإِنَّا لَنَرَاكَ فِينَا ضَعِيفًا ۖ وَلَوْلَا رَهْطُكَ لَرَجَمْنَاكَ ۖ وَمَا أَنْتَ عَلَيْنَا بِعَزِيزٍ ٩١

त्यांनी म्हटले हे शोएबा! तुझ्या बहुतेक गोष्टीतर आमच्या लक्षात येत नाहीत; (९) आणि आम्ही तर तुला, आमच्यात फार दुर्बल समजतो; (१०) जर तुझ्या कुटुंबाचा (आम्ही) विचार केला नसता. तर तुला आम्ही धोंडमार करून टाकले असते. (११) आणि आम्ही तुला काही प्रतिष्ठीत व्यक्ती म्हणून गणत नाही. (१२) ९१

قَالَ يَا قَوْمِ أَرَهْطِي أَعَزُّ عَلَيْكُمْ مِنَ اللَّهِ وَاتَّخَذْتُمُوهُ وَرَاءَكُمْ ظِهْرِيًّا ۖ إِنَّ رَبِّي بِمَا تَعْمَلُونَ مُحِيطٌ ٩٢

त्यांनी उत्तर दिले, हे माझ्या समाज बांधवांनो! काय तुमच्या जवळ माझ्या कुटुंबाचे लोक, अल्लाहपेक्षा सुद्धा जास्त प्रतिष्ठीत आहेत? की तुम्ही त्याला आपल्या पाठीमागे टाकून दिले (१३) आहे. खचित्‌च माझा पालनकर्ता, जे काही तुम्ही करीत आहात, सर्वाला घेरून आहे. ९२

وَيَا قَوْمِ اعْمَلُوا عَلَىٰ مَكَانَتِكُمْ إِنِّي عَامِلٌ ۖ سَوْفَ تَعْلَمُونَ مَنْ يَأْتِيهِ عَذَابٌ يُخْزِيهِ وَمَنْ هُوَ كَاذِبٌ ۖ وَارْتَقِبُوا إِنِّي مَعَكُمْ رَقِيبٌ ٩٣

हे समाजबांधवांनो! आता तुम्ही आपल्या जागी कर्म करीत रहा, मी पण कर्म करीत आहे. तुम्हास लवकरच ठाऊक होऊन जाईन की, कोणाजवळ ती शिक्षा येणार आहे; जी त्याला फजित करून टाकेल, आणि कोण आहे जो लबाड आहे. तुम्ही वाट पहा, मी पण तुमच्याबरोबर वाट पहातो. (१४) ९३

وَلَمَّا جَاءَ أَمْرُنَا نَجَّيْنَا شُعَيْبًا وَالَّذِينَ آمَنُوا مَعَهُ بِرَحْمَةٍ مِنَّا وَأَخَذَتِ الَّذِينَ ظَلَمُوا الصَّيْحَةُ فَأَصْبَحُوا فِي دِيَارِهِمْ جَاثِمِينَ ٩٤

जेव्हा आमचा हुकूम (शिक्षा) येऊन पोहचला, आम्ही शोएबला आणि त्यांच्याबरोबर (तमाम) मुसलमानांना, आपल्या खास दयेने मुक्ती दिली, आणि जालिमांना मोठ्या कडक आवाजाच्या शिक्षेने, येऊन पकडले, (१५) ज्यामुळे ते आपल्या घरात, पालथे पडलेले, मृत होऊन पडले ९४

१) सलातने अभिप्रेत, उपासना, किंवा धर्म आहे.

२) याच्याने अभिप्रेत, काही भाष्यकारांजवळ, जकात आणि दानधर्म आहे. ज्याचा हुकूम प्रत्येक आकाशी ग्रंथात दिला गेला आहे. अल्लाहच्या हुकूमाने जकात आणि दानधर्माचा खर्च, अल्लाहच्या आज्ञाभंजकांना फारच भारी आणि जड वाटतो. आणि ते असे समजतात की, जेव्हा आमच्या मेहनतीने, आणि बुद्धी कौशल्याने, धनसंपत्ती कमावितो, तर

त्याच्या खर्च करण्यावर किंवा खर्च न करण्यावर आमच्यावर बंधन का असावे? आणि याचा काही भाग, खास कामासाठी काढण्यावर, आम्हाला भाग का पाडले जावे? अशाचप्रकारे, व्यवसाय आणि धंद्यात, हलाल आणि हराम, योग्य आणि अयोग्याचे बंधन, अशा लोकांना फारच भारी वाटते. शक्य आहे मापा तोलात कमी करण्याला, मना करण्याला सुद्धा त्यांनी आपल्या सांपत्तिक व्यवहारात, ढवळाढवळ समजले असेल. आणि या शब्दात त्याला नाकारले असेल. दोन्हीही भावार्थ याचे बरोबर आहे.

३) ह.शोएब ﷺ साठी त्यांनी हे शब्द टिंगल म्हणून म्हटले.

४) चांगल्या रोजीचा दुसरा भावार्थ, पैगंबरी पण सांगण्यात आला आहे.

५) म्हणजे ज्या कामापासून तुम्हास मना करू, तुमच्यापासून लपवून, ते मी स्वत: करू; असे होऊ शकत नाही.

६) मी तुम्हांस जे काम करण्यास, किंवा ज्यापासून मनाईचा हुकूम देतो, याच्याने उद्देश्य आपल्या कुवतीनुसार, तुमच्यात सुधारणा करणेच आहे.

७) म्हणजे सत्त्यापर्यंत पोहचण्याचा जो माझा इरादा आहे, तो अल्लाहच्या दिलेल्या सुबुद्धीनेच शक्य आहे. म्हणून सर्व मामल्यांमध्ये, माझा भरोसा त्याच्यावरच आहे. आणि मी त्याच्याचकडे वळतो.

८) म्हणजे त्यांची जागा तुमच्यापासून दूर नाही. किंवा त्या कारणाने तुमच्या पासून दूर नाही, जे त्यांच्या शिक्षेला कारणीभूत ठरले.

९) हे एक तर त्यांनी टिंगल टवाळी म्हणून म्हटले, वास्तविक त्यांच्या गोष्टी, ते समजत होते किंवा त्यांचा उद्देश्य या गोष्टींना समजण्याची असमर्थता दर्शविण्याचा आहे. ज्यांचा संबंध अदृष्टाशी आहे. उदाहरणार्थ मृत्यू नंतर पुन्हा जीवंत होऊन उठणे, कर्मांचा लेखाजोखा, स्वर्ग नरक, वगैरे; या अनुषंगाने, समजाची कमतरता वास्तविक होईल.

१०) हे दौर्बल्य शारीरिक होते. जसे की काहींची कल्पना आहे की, ह.शोएब ﷺ ची दृष्टी अधु होती. किंवा ते अशक्त आणि दुबळे होते. ते स्वत: विरोधकांशी एकट्याने सामना करण्याचे सामर्थ्य बाळगत नव्हते.

११) असे म्हणतात की, ह.शोएब ﷺ चे कुटुंब, पण त्यांचे पाठीराखे नव्हते. परंतु ते कुटुंब, कारण की, कुफ्र आणि शिर्कमध्ये, आपल्याच समजाबरोबर होते; म्हणून आपले समानधर्मी होण्याचे कारण असूनसुद्धा या कुटुंबाची वागणूक ह.शोएब ﷺ बरोबर कडक वागणूक ठेवणे किंवा त्यांना नुकसान पोहचविणे याच्या विरूद्ध होती.

१२) परंतु तुझ्या कुटुंबाचा दबदबा आमच्या मनावर आहे, म्हणून आम्ही तुझ्याकडे डोळे झाक करीत आहोत.

१३) की तुम्ही तर माझ्या कुटुंबामुळे, माझ्याकडे डोळे झाक करीत आहात, परंतु ज्या अल्लाहने मला पैगंबरीपद देऊन भुषविलेआहे, त्याचे काही मोठेपण, आणि या पदाचा काही मान सन्मान, तुमच्या मनात नाही. आणि याला तुम्ही पाठीमागे टाकून दिले आहे. येथे ह.शोएब ﷺ नी माझ्यापेक्षा जास्त, प्रतिष्ठीतच्या ऐवजी अल्लाहपेक्षा जास्त प्रतिष्ठीत म्हटले; ज्याने हे दाखविण्याचा उद्देश्य आहे की, पैगंबराचा अवमान, हा वास्तविक अल्लाहचा अवमान आहे. यासाठी की, पैगंबर हा अल्लाहचा प्रतिनिधी असतो. आणि या अनुषंगाने आतां, सत्त्यावर असलेल्या धर्मपंडीतांचा अवमान, आणि त्यांना नाकारणे, हा अल्लाहच्या धर्माचा अवमान आणि त्याला नाकारणे आहे. यासाठी की, ते अल्लाहच्या धर्माचे प्रतिनिधी आहेत, 'वत्तखज्तुमूहु' मध्ये 'हू' चा मर्जा अल्लाह आहे. आणि अर्थ हा आहे की, अल्लाहच्या त्या मामल्यात, ज्याला घेऊन त्याने मला पाठविले आहे, त्याला तुम्ही पाठीमागे टाकून दिले आहे. आणि त्याची तुम्ही काही पर्वा केली नाही.

१४) जेव्हा त्यांनी पाहिले की हे लोक, आपल्या कुफ्र आणि शिर्कवर अडिग आहेत; आणि हितोपदेशाचा पण त्यांच्यावर काही परिणाम होत नाही; तेव्हा म्हटले की, ठीक आहे! आता तुम्ही तुमची वाट चालत रहा. लवकरच तुम्हास खऱ्या खोट्याचा, आणि या गोष्टीचा की, फजित करणाऱ्या शिक्षेला कोण पात्र आहे? ठाऊक होऊन जाईन.

१५) ह्या गर्जनेने त्यांची हृदये छिन्न विछिन्न होऊन गेलीत, आणि त्यांचा मृत्यू घडून आला. आणि त्याच्यानंतर लगेच भूकंपपण आला. जसे की, सु.आअ्राफ आ.९१ आणि सु.अन्कबूत आ.३७ मध्ये आहे. आणि सू.शुअरा आ.१८९ मध्ये आहे की, ढगाच्या सावलीच्या दिवसाच्या शिक्षेने त्यांना येऊन गाठले (याच्या तपशिलासाठी कृपया पहावे सु.शुअरा आ.१८९ चा समास-९) वास्तविक ही उम्मत एकच आहे, परंतु कुरआन करीमने इच्या शिक्षेसाठी, तीन शब्द वापरले आहेत. तर वास्तविक शिक्षेत या तिन्ही गोष्टी एकत्रित झाल्या होत्या. परंतु प्रत्येक ठिकाणी, प्रसंगानुरूप, कोण्या एका गोष्टीचा उल्लेख केला. (तफसीर इब्ने कसीर)

كَأَن لَّمْ يَغْنَوْا فِيهَا ۗ أَلَا بُعْدًا لِّمَدْيَنَ كَمَا بَعِدَتْ ثَمُودُ ﴿٩٥﴾

जणू की ते या घरामध्ये, कधी वसलेच नव्हते. लक्षात ठेवा! जसे 'समूद' दुरावले होते तसेच 'मदयन' दुरावले[१] गेले. (९५)

وَلَقَدْ أَرْسَلْنَا مُوسَىٰ بِآيَاتِنَا وَسُلْطَانٍ مُّبِينٍ ﴿٩٦﴾

आणि आम्ही मूसाला आपल्या निशाण्या आणि स्पष्ट प्रमाणासह पाठविले होते.[२] (९६)

إِلَىٰ فِرْعَوْنَ وَمَلَئِهِ فَاتَّبَعُوا أَمْرَ فِرْعَوْنَ ۖ وَمَا أَمْرُ فِرْعَوْنَ بِرَشِيدٍ ﴿٩٧﴾

फिरऔन आणि त्याच्या सरदारांकडे,[३] तरी सुद्धा त्या लोकांनी, फिरऔनाच्या आदेशांचे अनुकरण केले; आणि फिरऔनाचा कोणी हुकूम ठिक आणि बरोबर नव्हताच[४] (९७)

يَقْدُمُ قَوْمَهُ يَوْمَ الْقِيَامَةِ فَأَوْرَدَهُمُ النَّارَ ۖ وَبِئْسَ الْوِرْدُ الْمَوْرُودُ ﴿٩٨﴾

तो तर कयामतच्या दिवशी आपल्या लोकांच्या पुढे पुढे राहून, त्या सर्वांना नरकाग्नीत नेऊन उभे करील.[५] तो फारच वाईट घाट आहे,[६] ज्यावर नेऊन ते उभे केले जातील. (९८)

وَأُتْبِعُوا فِي هَٰذِهِ لَعْنَةً وَيَوْمَ الْقِيَامَةِ ۚ بِئْسَ الرِّفْدُ الْمَرْفُودُ ﴿٩٩﴾

यांच्यावर तर या जगात सुद्धा यांच्या (पाठीमागे) शाप चिटकवून देण्यात आला. आणि कयामतच्या दिवशीसुद्धा;[७] वाईट बक्षीस आहे जे यांना देण्यात आले.[८] (९९)

ذَٰلِكَ مِنْ أَنبَاءِ الْقُرَىٰ نَقُصُّهُ عَلَيْكَ ۖ مِنْهَا قَائِمٌ وَحَصِيدٌ ﴿١٠٠﴾

वस्त्यांचे हे काही वृत्तांत ज्यांना आम्ही तुझ्यासमोर वर्णन करीत आहोत. यांच्यातून काही तर अस्तित्वांत आहेत; आणि काही बिलकुल् नामशेष होऊन गेलीत[९] (१००)

१) म्हणजे, शाप, धुत्कार, अल्लाहतआलाच्या दयेकडून वंचित आणि दूर रहाणे, बर्बादी आणि भलाईपासून वंचित राहण्याचा शाप आहे.

२) निशाण्यांनी कांहीजवळ तौरात, आणि 'सुलताने मुबीन' ने, चमत्कार अभिप्रेत आहेत. आणि काही म्हणतात की, 'आयात' ने नऊ निशाणी, आणि सुलताने मुबीन' ने (स्पष्टप्रमाणे) काठी अभिप्रेत आहे. जरी काठीचा चमत्कार नऊ निशांण्यात शामील आहे, परंतु हा चमत्कार फारच महान होता, म्हणून याला विशेष म्हणून सांगण्यात आले आहे.

३) 'मलउन' समाजातील प्रतिष्ठीत आणि लोकप्रिय लोकांना म्हटले जाते. (याचा खुलासा पूर्वी येऊन चुकला आहे.) फिरऔनाबरोबर, त्याच्या दरबाराच्या लोकप्रिय लोकांचे नाव यासाठी घेण्यात आले की, समाजातील प्रतिष्ठीत लोकच, प्रत्येक मामल्यात जबाबदार असतात. आणि लोक यांच्याच मागे चालत होते. जर हे ह.मूसा عليه السلام वर ईमान घेऊन आले असते, तर नक्कीच फिरऔनाचे सर्व लोक, ईमान घेऊन आले असते.

४) 'रशीद' 'हिदायत मिळालेल्या' च्या अर्थांत आहे. म्हणजे गोष्ट तर ह. मूसा عليه السلام च्या हिदायतची होती, परंतु तिला या लोकांनी रद्द करून टाकले; आणि फिरऔनाचे म्हणणे, जे हिदायतपासून दूर होते, त्याचे यांनी अनुकरण केले.

५) म्हणजे फिरऔन जगात, ज्याप्रमाणे यांचा मार्गदर्शक आणि पुढे पुढे त्यांना घेऊन जाणारा होता; कयामतच्या दिवशी सुद्धा, हा पुढे पुढेच राहील, आणि आपल्या लोकांना आपल्या पुढाकारात, नरकाग्नीत घेऊन जाईल.

६) 'विर्द' पाण्याच्या घाटाला म्हणतात, जेथे ताहानलेले जाऊन, आपली तहान भागवतात. परंतु येथे नरकाग्नीला विर्द म्हटले गेले आहे. 'मौरूद' ते स्थळ किंवा घाट, म्हणजे नरकाग्नीत जे लोक घेऊन जाण्यांत येतील. म्हणजे ठिकाणपण वाईट, आणि त्यात जाणारे पण वाईट.

७) शापाने अभिप्रेत, 'फिटकार' आणि अल्लाहच्या दयेकडून, दूर आणि वंचित् राहणे आहे. जणू जगात सुद्धा, ते अल्लाहच्या दयेकडून वंचित आणि परलोकांत पण याच्याकडून वंचित्च राहतील; जर त्यांनी ईमान आणले नाही.

८) 'रिफ्दुन' बक्षीस आणि देणगीला म्हणण्यात येते. येथे शापला 'रिफ्द' म्हणण्यात आले आहे. म्हणूनच त्याला 'वाईट बक्षीस' ठरविण्यात आले. 'मर्फूद' ने अभिप्रेत, ते बक्षीस जे कोणास दिले जावे.

९) 'काईम' ने अभिप्रेत, त्या वस्त्या, ज्या आपल्या छतांवर स्थिर आहेत; आणि 'हसीद' ने अभिप्रेत त्या वस्त्या, ज्या कापून टाकलेल्या शेतीप्रमाणे नामशेष झाल्यात. म्हणजे ज्या मागे होऊन गेलेल्या वस्त्यांचे वृत्तांत, आम्ही आपणास सांगत आहोत; यांच्यातून तर काही आजपण अस्तित्वात आहेत. ज्यांचे अस्तित्व आणि त्यांची खिंडारे, धडा घेण्यासारखे आहेत. आणि काही तर अगदीच भूतलावरून नामशेष होऊन गेल्यात, आणि त्यांचे अस्तित्व इतिहासाच्या पानांत, शिल्लक राहिले आहे.

وَمَا ظَلَمْنٰهُمْ وَلٰكِنْ ظَلَمُوْٓا اَنْفُسَهُمْ فَمَآ اَغْنَتْ عَنْهُمْ اٰلِهَتُهُمُ الَّتِىْ يَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ مِنْ شَىْءٍ لَّمَّا جَآءَ اَمْرُ رَبِّكَ ؕ وَمَا زَادُوْهُمْ غَيْرَ تَتْبِيْبٍ ﴿۱۰۱﴾

आम्ही त्यांच्यावर काहीच जुलुम केला नाही;[१] किंबहुना स्वत: त्यांनीच आपल्यावर जुलूम केला[२] आणि त्यांना त्यांच्या उपास्यांनी काही फायदा पोहचवला नाही, ज्यांना ते अल्लाहशिवाय बोलावित होते; जेव्हा की तुझ्या पालनकर्त्याचा हुकूम येऊन पोहोचला; किंबहुना त्यांचे नुकसानच त्यांनी वाढवून दिले.[३] (१०१)

وَكَذٰلِكَ اَخْذُ رَبِّكَ اِذَآ اَخَذَ الْقُرٰى وَهِىَ ظَالِمَةٌ ؕ اِنَّ اَخْذَهٗٓ اَلِيْمٌ شَدِيْدٌ ﴿۱۰۲﴾

तुझ्या पालनकर्त्याच्या पकडीची हीच रीत आहे, जेव्हा की तो वस्त्यांच्या राहणाऱ्या जालिमांना पकडतो; नि:संशय त्याची पकड दु:ख देणारी, आणि फारच सख्त आहे.[४] (१०२)

اِنَّ فِىْ ذٰلِكَ لَاٰيَةً لِّمَنْ خَافَ عَذَابَ الْاٰخِرَةِ ؕ ذٰلِكَ يَوْمٌ مَّجْمُوْعٌ ۙ لَّهُ النَّاسُ وَذٰلِكَ يَوْمٌ مَّشْهُوْدٌ ﴿۱۰۳﴾

खचितच् याच्यात,[५] या लोकांसाठी एक धडा आहे, जे कयामतच्या शिक्षेला भितात, तो दिवस ज्या दिवशी सर्व लोक (एकत्र) गोळा केले जातील; तो, तो दिवस आहे, ज्यांत सर्व हजर केले जातील[६] (१०३)

وَمَا نُؤَخِّرُهٗٓ اِلَّا لِاَجَلٍ مَّعْدُوْدٍ ﴿۱۰۴﴾ؕ

याला आम्ही जो उशीर लावत आहोत, तो फक्त एका निश्चित मुदती पर्यंत आहे.[७] (१०४)

يَوْمَ يَاْتِ لَا تَكَلَّمُ نَفْسٌ اِلَّا بِاِذْنِهٖ ۚ فَمِنْهُمْ شَقِىٌّ وَّسَعِيْدٌ ﴿۱۰۵﴾

ज्या दिवशी ती येऊन जाईल, हिम्मत होणार नाही की, अल्लाहच्या परवानगी शिवाय कोणी बोलू[८] पण शकेल, त्यांच्यातून कित्येक दुर्दैवी असतील, आणि कोणी सुदैवी (१०५)

१) त्यांना शिक्षा आणि बर्बादीत व्यस्त करून.

२) कुफ्र आणि गुन्ह्यांचा प्रयत्न करून.

३) जेव्हा की त्यांची श्रद्धा अशी होती की, हे त्यांना नुकसान पासून वांचवतील आणि फायदा पोहोचवतील. परंतु जेव्हा अल्लाहची शिक्षा आली, तेव्हा स्पष्ट होऊन गेले की, त्यांची ही श्रद्धा व्यर्थ होती. आणि ही गोष्ट सिद्ध झाली की, अल्लाहच्या शिवाय कोणी कोणाला, फायदा नुकसान पोहचविण्यास समर्थ नाही.

४) म्हणजे ज्या प्रमाणे मागे होऊन गेलेल्या वस्त्यांना, अल्लाहतआलाने तबाह आणि बर्बाद केले; यापुढे सुद्धा, तो अशाचप्रकारे, पकड करण्यास समर्थ आहे. हदीसमध्ये येते, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''अल्लाहतआला खचित्च जालिमाला अवकाश देतो; परंतु जेव्हा पकड करण्यावर येतो, तर अशा प्रकारे अचानक करतो की, मग अवकाश देत नाही.'' मग नबी ﷺ नी हीच आयत म्हटली (स.बुखारी, स. मुस्लीम)

५) म्हणजे अल्लाहच्या पकडीत, किंवा त्या घटनांत, जी धडा घेण्यासाठी आणि उपदेशपुर वर्णन करण्यात आली आहेत.

६) म्हणजे हिशेब आणि बदल्यासाठी, सुरवातीपासून शेवटापर्यंत, सर्व लोक जमा होतील. कोणी बाकी राहणार नाही. जसे सांगितले, ''आम्ही लोकांस एकत्र गोळा करू, आणि त्यांचेपैकी कोणालाही (एकालाही) सोडणार नाही.'' (सू. कहफ-४७) देवदूत सुद्धा, पैगंबर व रसूल सुद्धा, आणि विश्वातील सर्व निर्मितीसुद्धा, मनुष्ये, जिन्न, चरणारे प्राणी व उडणारे पक्षी, आणि दुसरे पशु, मग त्यांच्या दर्म्यान अल्लाहतआला, न्यायाप्रमाणे फैसला करील.

७) म्हणजे कयामतच्या दिवसास उशीर फक्त या कारणाने आहे की, अल्लाह तबारक व तआला, ने याच्यासाठी एक वेळ निश्चित केला आहे; जेव्हा तो निश्चित वेळ किंवा नाम नियुक्त केलेला समय येऊन लागेल, तेव्हां एका क्षणाचा पण उशीर होणार नाही.

८) संभाषण न करण्याने अभिप्रेत, कोणाला अल्लाहतआलाशी वादविवाद आणि तक्रारीची, किंवा शिफारस करण्याची, हिंमत होणार नाही, परंतु हे की, त्याने परवानगी द्यावी. हदीस शिफारशीमध्ये आहे. रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, ''त्या दिवशी पैगंबरांशिवाय, कोणालाही संभाषणाची परवानगी असणार नाही. आणि पैगंबरांच्या जिभेवर सुद्धा, त्या दिवशी फक्त हेच असेल, या अल्लाह! आम्हास वांचवून घे!! आम्हास वांचवून घे!!!' (स.बुखारी, स. मुस्लिम)

فَاَمَّا الَّذِيْنَ شَقُوْا فَفِى النَّارِ لَهُمْ فِيْهَا زَفِيْرٌ وَّ شَهِيْقٌ ﴿١٠٦﴾

परंतु जे दुर्दैवी असतील, ते नरकाग्नीत असतील, तेथे त्याचा बारीक आणि मोठा गाढवा सारखा आवाज असेल. (१०६)

خٰلِدِيْنَ فِيْهَا مَا دَامَتِ السَّمٰوٰتُ وَالْاَرْضُ اِلَّا مَا شَآءَ رَبُّكَ ؕ اِنَّ رَبَّكَ فَعَّالٌ لِّمَا يُرِيْدُ ﴿١٠٧﴾

ते त्यांतच नित्य राहणार आहेत; जोपर्यंत आकाश आणि पृथ्वी स्थिर राहतील;[१] शिवाय त्या वेळेपर्यंत जो अल्लाहतआलाने इच्छिला असेन.[२] खचित्च तुझा पालनकर्ता जे इच्छितो, ते करून टाकतो (१०७)

وَ اَمَّا الَّذِيْنَ سُعِدُوْا فَفِى الْجَنَّةِ خٰلِدِيْنَ فِيْهَا مَا دَامَتِ السَّمٰوٰتُ وَالْاَرْضُ اِلَّا مَا شَآءَ رَبُّكَ ؕ عَطَآءً غَيْرَ مَجْذُوْذٍ ﴿١٠٨﴾

परंतु जे सुदैवी केले गेले, ते स्वर्गांत असतील; जेथे सदा सर्वदा राहतील; जो पर्यंत आकाश आणि पृथ्वी बाकी राहतील. परंतु जे तुझा पालनकर्ता इच्छेल.[३] हे कधीच न संपणारे बक्षीस आहे.[४] (१०८)

فَلَا تَكُ فِىْ مِرْيَةٍ مِّمَّا يَعْبُدُ هٰٓؤُلَآءِ ؕ مَا يَعْبُدُوْنَ اِلَّا كَمَا يَعْبُدُ اٰبَآؤُهُمْ مِّنْ قَبْلُ ؕ وَاِنَّا لَمُوَفُّوْهُمْ نَصِيْبَهُمْ غَيْرَ مَنْقُوْصٍ ﴿١٠٩﴾

म्हणून तुम्ही, या गोष्टीकडून शंकाकुशंकेत राहू नये. ज्यांची हे लोक पुजा करतात, त्यांची पुजा तर अशी आहे, ज्याप्रमाणे त्यांच्या वाडवडीलांची, यांच्या पूर्वी होती. आम्ही या सर्वांना, त्यांचा पुरा पुरा वांटा, कुठल्याही कमी शिवाय, देणारच आहोत.[५] (१०९)

१) या शब्दांनी काही लोकांचा असा चुकीचा समज झाला आहे की, काफिरांकरीता नरकाग्नीची शिक्षा कायम स्वरूपी नाही; किंबहुना मर्यादित आहे; म्हणजे त्यावेळेपर्यंत राहील, जो पर्यंत आकाश आणि पृथ्वी राहतील. परंतु ही गोष्ट बरोबर नाही. कारण की येथे, मा 'दामतिस्समावाति वल् अर्ज' अरबांच्या रोज वापरण्यात येणाऱ्या आणि म्हणीप्रमाणे अवतरीत झाला आहे. अरबांना ही संवय होती की, जेव्हा कोण्या गोष्टीचे कायम राहणे, सिद्ध करण्याचा उद्देश्य असे, तेव्हा ते म्हणत असत की, ''हाजा दाईमून दवामस् समावति वल् अर्ज'' (ही गोष्ट अशी नेहमी राहील, ज्याप्रमाणे आकाश आणि पृथ्वी कायम राहणारे आहेत.) या म्हणीला कुरआन करीम मध्ये वापरण्यात आले आहे. ज्याचा अर्थ हा आहे की, कुफ्र आणि शिर्कवाले नरकाग्नीत नेहमी राहतील; ज्याचा कुरआनाने अनेक ठिकाणी, 'खालि दीना फीहा अबदा' च्या शब्दाने उल्लेखिले आहे. याचा दुसरा भावार्थ हा पण सांगण्यात आला आहे की, आकाश व पृथ्वीने अभिप्रेत, जिन्स (एक वस्तु) आहे. म्हणजे या जगातील आकाश आणि पृथ्वी वेगळे आहेत, जे नाश पावतील. परंतु परलोकातील आकाश आणि जमीन, यांच्यापेक्षा वेगळे असतील; जसा की कुरआन करीम मध्ये याचा खुलासा आहे, ''त्या दिवशी ही जमीन, दुसऱ्या जमिनीने बदलून देण्यात येईल; आणि आकाश पण बदलून दिले जातील.'' (सू. इब्राहीम-४८) आणि परलोकातील हे आकाश आणि जमीन, स्वर्ग आणि नर्कासारखे, नित्य नेहमी राहतील. या महावाक्यात हेच आकाश आणि जमीन, अभिप्रेत आहेत; जगातले आकाश आणि जमीन नाहीत, जे नाश पावतील. (इब्ने कसीर) या दोन्ही भावार्थातून, कुठलाही भावार्थ गृहीत धरला, तर महावाक्याचा अर्थ स्पष्ट होऊन जातो; आणि ती शंका निर्माण होत नाही, जो वर उल्लेखिला गेला. इमाम शौकानीने याचे आणखी ही अनेक भावार्थ सांगितले आहे. ज्यांना, ज्ञानपिपासू पाहू शकतात. (फत्हुल कदीर)

२) या वेगळे करण्याचे पण कित्येक भावार्थ सांगण्यांत आले आहे. याच्यात सर्वांत जास्त बरोबर अर्थ हाच आहे की, हे वेगळे करणे त्या गुन्हेगारांसाठी आहे जे एकेश्वरवादी आणि ईमानवाले असतील. या अनुषंगाने याच्या पूर्वीच्या महावाक्यात 'शकीय्युन' चा शब्द सर्वसाधारण काफिर आणि गुन्हेगार दोघांना समाविष्ट करणारा असेल. आणि 'इल्ला माशाअ रब्बुक' ने ईमानवाल्या गुन्हेगारांना वगळ्यांत येईल. आणि 'माशाअ' मध्ये, 'मा' 'मन्' च्या अर्थात आहे.

३) हे वगळणे पण गुन्हेगार ईमानावाल्यांसाठी आहे. म्हणजे दुसऱ्या नर्कवासियांप्रमाणे हे आज्ञाभंजक ईमानवाले नेहमी नर्कांत राहणार नाहीत; किंबहुना सुरवातीला त्यांचा काही काळ नर्कात गेला असेल आणि मग पैगंबर आणि ईमानवाले यांच्या शिफारसीने, त्यांना नर्कातून काढून, स्वर्गांत दाखल केले जाईल. जसे की, सहीह हदीशींनी या गोष्टी सिद्ध आहेत.

४) 'गैर मजजुज' चा अर्थ आहे. 'गैर मकतुअ' म्हणजे न संपणारी देणगी. या महा वाक्याने, हे स्पष्ट होऊन जाते की, ज्या गुन्हेगारांना, नर्कातून काढून स्वर्गांत दाखल करून देण्यात येईल, हा प्रवेश, तात्पुरता नाही, नेहमीसाठी असेल; आणि सर्व स्वर्गवासी अल्लाहच्या देणग्या आणि नेअमतांनी लाभान्वित होत राहतील. याच्यात कधी खंड पडणार नाही.

५) याच्याने अभिप्रेत ती शिक्षा आहे, जिला ते पात्र असतील; इच्यात काही कमी केले जाणार नाही.

وَلَقَدْ اٰتَيْنَا مُوْسَى الْكِتٰبَ فَاخْتُلِفَ فِيْهِ ؕ وَلَوْلَا كَلِمَةٌ سَبَقَتْ مِنْ رَّبِّكَ لَقُضِيَ بَيْنَهُمْ ؕ وَاِنَّهُمْ لَفِيْ شَكٍّ مِّنْهُ مُرِيْبٍ ۝١١٠

आणि निश्चितच आम्ही मूसाला पुस्तक दिले. मग त्यांच्यात मतभेद करण्यांत आला.[१] जर पूर्वीच, आपल्या पालनकर्त्याची गोष्ट, सादर झाली नसती, तर खचित्च यांचा फैसला करून टाकण्यांत आला असतां.[२]त्यांना तर याच्यांत शंकास्पद आहे. ११०

وَاِنَّ كُلًّا لَّمَّا لَيُوَفِّيَنَّهُمْ رَبُّكَ اَعْمَالَهُمْ ؕ اِنَّهٗ بِمَا يَعْمَلُوْنَ خَبِيْرٌ ۝١١١

आणि खचित्च यांच्यातून प्रत्येक, जेव्हा त्यांच्या समक्ष जातील, तेव्हांआपला पालनकर्ता त्याला त्याच्या कर्मांचा पुरा पुरा बदला देईन; निसंशय ते जे काही करीत आहे, तो त्याच्याशी माहितगार आहे. १११

فَاسْتَقِمْ كَمَاۤ اُمِرْتَ وَمَنْ تَابَ مَعَكَ وَلَا تَطْغَوْا ؕ اِنَّهٗ بِمَا تَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ۝١١٢

बस! आपण जमून रहा, जसा की, आपणास हुकूम देण्यात आला आहे; आणि ते लोक पण जे आपल्या बरोबर तौबा करून चुकले आहेत. खबरदार! तुम्ही मर्यादेचे बाहेर जाऊ नये.[३] अल्लाह तुमच्या सर्व कर्मांना पाहणारा आहे. ११२

وَلَا تَرْكَنُوْۤا اِلَى الَّذِيْنَ ظَلَمُوْا فَتَمَسَّكُمُ النَّارُ ۙ وَمَا لَكُمْ مِّنْ دُوْنِ اللّٰهِ مِنْ اَوْلِيَآءَ ثُمَّ لَا تُنْصَرُوْنَ ۝١١٣

पहा! जालीमांकडे अजिबात वळू नका; नाही तर तुम्हास सुद्धाआगीच्या ज्वाला, लागून जातील.[४] आणि अल्लाहशिवाय आणखी कोणी, तुमचा मददगार म्हणून उभा राहूशकणार नाही; न तुम्हास मदत दिली जाईल. ११३

وَاَقِمِ الصَّلٰوةَ طَرَفَيِ النَّهَارِ وَزُلَفًا مِّنَ الَّيْلِ ؕ اِنَّ الْحَسَنٰتِ يُذْهِبْنَ السَّيِّاٰتِ ؕ ذٰلِكَ ذِكْرٰى لِلذّٰكِرِيْنَ ۝١١٤

आणि दिवसाच्या दोन्ही कडेच्या भागात, नमाज पढत रहा; आणि रात्रीच्या काही घटकात सुद्धा.[५] खचित्च पुण्यकर्मे ही पाप कर्मांचे निरसन करतात.[६] हा उपदेश आहे, उपदेश ग्रहण करणाऱ्यांसाठी ११४

وَاصْبِرْ فَاِنَّ اللّٰهَ لَا يُضِيْعُ اَجْرَ الْمُحْسِنِيْنَ ۝١١٥

आणि आपण सहन करीत राहा; खचित्च अल्लाहतआला, पुण्य करणाऱ्यांचे प्रतिफल वाया जाऊ देत नसतो. ११५

فَلَوْلَا كَانَ مِنَ الْقُرُوْنِ مِنْ قَبْلِكُمْ اُولُوْا بَقِيَّةٍ يَّنْهَوْنَ عَنِ الْفَسَادِ فِي الْاَرْضِ اِلَّا قَلِيْلًا مِّمَّنْ اَنْجَيْنَا مِنْهُمْ ۚ وَاتَّبَعَ الَّذِيْنَ ظَلَمُوْا مَاۤ اُتْرِفُوْا فِيْهِ وَكَانُوْا مُجْرِمِيْنَ ۝١١٦

तर का म्हणून, तुमच्या पूर्वीच्या काळांतील लोकांमधून, असे गुणावशेष संपन्न लोक झाले नाहीत, जे जमिनीवर फिसाद फैलाविण्यापासून मना करते? शिवाय त्या थोड्या लोकांच्या, ज्यांना आम्ही त्यांच्यातून, सुटका दिली होती.[७] जालीम लोक तर त्या वस्तुच्या मागे लागून गेले, ज्यात त्यांना संपन्नता देण्यात आली होती; आणि ते अपराधी होते.[८] ११६

وَمَا كَانَ رَبُّكَ لِيُهْلِكَ الْقُرٰى بِظُلْمٍ وَّاَهْلُهَا مُصْلِحُوْنَ ۝١١٧

तुमचा पालनकर्ता असा नाही की, कोण्या वस्तीला जुलूमाने नष्ट करून टाकेन; आणि तेथले लोक सुकृत्ये करणारे असावेत ११७

وَلَوْ شَآءَ رَبُّكَ لَجَعَلَ النَّاسَ اُمَّةً وَّاحِدَةً وَّلَا يَزَالُوْنَ مُخْتَلِفِيْنَ ۝١١٨

जर तुमचा पालनकर्ता इच्छिता, तर सर्व लोकांना एकाच मार्गावर एक समूह करुन देता, ते तर बरोबर मतभेद करणारेच राहतील. ११८

اِلَّا مَنْ رَّحِمَ رَبُّكَ ؕ وَلِذٰلِكَ خَلَقَهُمْ ؕ وَتَمَّتْ كَلِمَةُ رَبِّكَ لَاَمْلَـَٔنَّ جَهَنَّمَ مِنَ الْجِنَّةِ وَالنَّاسِ اَجْمَعِيْنَ ۝١١٩

शिवाय त्यांच्या, ज्यांच्यावर तुमचा पालनकर्ता दया करीन,[९] त्यांना तर याचसाठी निर्माण केले[१०] आहे. आणि तुमच्या पालनकर्त्याची ही गोष्ट पूर्ण आहे की, मी नरकाग्नीला 'जिन्न' आणि मनुष्यांनी, पूर्ण भरून टाकेन[११] ११९

१) म्हणजे कोणी या पुस्तकाला मानले, आणि कोणी मानले नाही. ही नबी ﷺ ची सांत्वना करण्यात येत आहे की, मागील पैगंबरांशी पण असाच मामला करण्यात आलेला आहे. काही लोक त्यांच्यावर ईमान आणित, आणि दुसरे नाकारणारे. म्हणून आपण, आपल्या नाकारण्याला घाबरू नये.

२) याच्याने अभिप्रेत हे आहे की, जर अल्लाहतआलाने त्यांच्यासाठी, पूर्वीपासूनच शिक्षेची एक वेळ निश्चित केली नसती, तर तो त्यांना ताबडतोब नष्ट करून टाकता.

३) या महावाक्यांत नबी करीम ﷺ आणि ईमानवाल्यांना, दृढ जमून राहण्याचा उपदेश केला जात आहे; जे शत्रुचा सामना करण्यासाठी एक फार मोठे हत्यार आहे. दुसरे 'तुगयान' म्हणजे 'बगी' (मर्यादेच्या बाहेर निघून जाणे) पासून मना करण्यात आले आहे; जे ईमानवाल्यांचे चारित्र्य विषयक सामर्थ्य, आणि कर्तृत्वाच्या उच्चतेसाठी फार आवश्यक आहे. येथपावेतो की मर्यादेबाहेर जाणे, शत्रुंबरोबर मामला करतांना सुद्धा योग्य नाही.

४) याचा अर्थ आहे की, जालिमाबरोबर मृदुता आणि लाळघोटेपणा करीत, त्यांच्याकडून मदत प्राप्त करू नका. त्यामुळे त्यांचा असा समज होईल की, जणू तुम्ही त्यांच्या दुसऱ्या गोष्टींनापण पसंत करतात. अशाप्रकारे हा तुमचा मोठा अपराध होऊन जाईल. जो तुम्हाला सुद्धा, त्यांचे बरोबर, नर्काच्या अग्नीसाठी पात्र बनवू शकतो. याच्याने जालीम सत्ताधाऱ्यांशी, मेळजोळ आणि संबंध ठेवण्याला सुद्धा मनाई माहित होते. याशिवाय की, सर्वसाधारण प्रयोजन, किंवा धार्मिक फायदे मिळविण्याचा उद्देश्य असावा. अशा स्वरूपात मनात तिरस्कार बाळगत, त्यांच्याशी मेळमिलाप आणि संबंध ठेवण्याला परवानगी राहील; जसे की काही हदीशींनी स्पष्ट आहे.

५) दिवसाच्या ''दोन्ही कडेच्या'' भागाने काहींनी फज्र आणि मगरीब, काहींनी फक्त 'ईशा' अभिप्रेत धरला आहे. आणि काहींनी 'ईशा' आणि मगरीब दोहोंचा वेळ अभिप्रेत धरला आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात, की शक्य आहे की, हे महावाक्य 'मेअराज' पूर्वी अवतरीत झाले असावे; ज्यात पांच नमाजी फर्ज (अनिवार्य) करण्यात आल्यात. कारण की, याच्यापूर्वी फक्त दोनच नमाजी आवश्यक होत्या; एक सूर्योदयापूर्वी आणि एक सूर्यास्तापूर्वी, आणि रात्रीच्या उत्तरार्धांत 'तहज्जुद' ची नमाज. मग 'तहज्जुद' ची नमाज, उम्मतसाठी, माफ करून देण्यात आली. मग इचे वाजिब होणे, काहीच्या म्हणण्यानुसार आपण ﷺ कडून सुद्धा, कमी करून टाकण्यांत आले. वल्लाहू अअलम्! (इब्ने कसीर)

६) ज्याप्रमाणे याला हदीशीमध्ये सुद्धा खुलाशासह वर्णन करण्यात आले आहे. उदाहरणार्थ, ''पांच नमाजी, शुक्रवारपासून दुसऱ्या शुक्रवारपर्यंत, आणि रमजान पासून दुसऱ्या रमजानपर्यंत, यांच्या दर्म्यान होणारे गुन्हे, दूर करणारे आहेत. या अटीवर की, कबीरा गुन्ह्यांपासून (स्वत:) वांचविले जावे.'' (स. मुस्लीम) एका आणखी हदीस मध्ये, रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, ''सांगा! की जर तुमच्या कोणाच्या दरवाजाजवळ, मोठा पाण्याचा पाट असेल, तो रोज यांच्यात पांच वेळेस आंघोळ करीत असेल; काय याच्यानंतर, याच्या अंगावर मळ बाकी राहील? सहाबांनी ﵃ अर्ज केला, 'नाही' आपण ﷺ नी फर्माविले ''अशाच प्रकारे पांच नमाजी आहेत; यांच्यामुळे अल्लाहतआला, गुन्ह्यांना व चुकांना पुसून टाकतो.'' (स. बुखारी, व स. मुस्लिम)

७) म्हणजे मागील उम्मतींमधून, असे सदाचरणी लोक का झाले, जे खोडसाळपणा करणाऱ्यांना आणि नाकारणाऱ्यांना, मना केलेल्या गोष्टीपासून, मना करते? मग सांगितले असे लोक होते खरे, परंतु फारच थोडे. त्यांना आम्ही त्यावेळी सुटका दिली, जेव्हा दुसऱ्यांना शिक्षेमार्फत नष्ट करून टाकण्यात आले.

८) म्हणजे हे जालीम आपल्या जुलुमावर कायम आणि आपल्या मस्तीत दंग राहिले, येथ पावेतो की, शिक्षेने येऊन त्यांना पकडले.

९) याच्याने ठाऊक झाले की, मतभेद, रहमत (दया) नाही. जसे की, तकलीदवाले, आपल्या तकलीद क्रमाला, योग्य ठरविण्यासाठी, म्हणत असतात. आणि एक अत्यंत जअीफ किंबहुना मनघडत (मौअजूअ) रिवायत पुढे करतात, ''माझ्या उम्मतीमधील मतभेद दया आहे.'' उम्मतचा हा मतभेद, (जो फिकही मतभेदाच्या स्वरूपात कायम आहे.) जर दया असती, तर नबी करीम ﷺ नी, उम्मते मुस्लिमामध्ये निर्माण होणाऱ्या, ७३ पंथामधून, ७२ पंथांना नर्कवासी, आणि फक्त एकाला स्वर्गवासी ठरविले नसते. अशाचप्रकारे अल्लाहतआला येथे फक्त, मतभेदांपासून वाचून जाणाऱ्यांना, आपल्या दयेला पात्र, आणि दुसऱ्यांना यापासून वंचित् ठरवितो.

१०) 'याचसाठी' चा अर्थ काहींनी, मतभेद आणि काहींनी दया घेतला आहे. दोन्ही स्वरूपात भावार्थ हा होईल की, आम्ही मानवांना आजमाविण्यासाठी निर्माण केले आहे. जो सत्त्यधर्माकडून मतभेदाचा मार्ग अंगिकारेल, तो परीक्षेत अयशस्वी; आणि जो त्याला आत्मसात करीन, तो यशस्वी, आणि अल्लाहच्या दयेला पात्र ठरेन.

११) म्हणजे अल्लाहने ठरविलेल्या प्रारब्धात आणि त्याच्या मर्जीत ही गोष्ट सिद्ध आहे की, काही लोक असे असतील, जे स्वर्गाचे, आणि काही लोक असे असतील जे नर्काला पात्र असतील. आणि स्वर्ग आणि नरकाला, मनुष्ये आणि जिन्नांनी भरून टाकण्यात येईल. जसे की हदीसमध्ये आहे. नबी ﷺ नी फर्माविले, ''स्वर्ग आणि नर्क, आपसात भांडण करू लागले; स्वर्गाने म्हटले, ''काय गोष्ट आहे, की माझ्यांत तेच लोक येतील, जे दुर्बल आणि समाजातील गरीब लोक असतील?'' नर्काने म्हटले, ''माझ्यामध्ये तर मोठे मोठे, कठोर आणि गर्विष्ठ प्रकारचे लोक असतील.'' अल्लाहतआलाने स्वर्गाला फर्माविले, ''तू माझ्या दयेची दर्शक आहे. तुझ्या मार्फत मी ज्याच्यावर इच्छेन, आपली दया करीन आणि जहन्नमला अल्लाहतआलाने फर्माविले, ''तू माझ्या शिक्षेची दर्शक आहे. तुझ्यामार्फत मी ज्याला इच्छेन, आपली कृपा करीन शिक्षा देईन. अल्लाहतआला स्वर्ग आणि नर्क, दोघांना भरून टाकेन. स्वर्गांत नेहमी त्यांची कृपा राहील. येथ पावेतो की, अल्लाहतआला अशी निर्मिती निर्माण करीन, जी स्वर्गाच्या शिल्लक राहिलेल्या भागात शिल्लक राहील. आणि नरकाग्नी, नर्कवासियांच्या भरपूर असूनसुद्धा, ''हल मिन मजीद'' (आणखीही कोणी आहे का?) ची ललकार लावील. येथपावेतो की अल्लाहतआला, त्यांच्यात आपले पाऊल ठेवेल. ज्यावर नरकाग्नी ओरडून म्हणेन; ''बस! बस्!! तुझ्या प्रतिष्ठा आणि शानची शपथ!'' (स.बुखारी, स.मुस्लिम)

وَكُلًّا نَّقُصُّ عَلَيْكَ مِنْ أَنۢبَآءِ ٱلرُّسُلِ مَا نُثَبِّتُ بِهِۦ فُؤَادَكَ ۚ وَجَآءَكَ فِى هَٰذِهِ ٱلْحَقُّ وَمَوْعِظَةٌ وَذِكْرَىٰ لِلْمُؤْمِنِينَ ﴿١٢٠﴾

पैगंबराचे सर्व अहवाल, आम्ही तुमच्यासमोर, आपल्या मनाच्या समाधानासाठी, सांगत आहोत. तुमच्याजवळ या स्वरूपात पण, सत्य पोहोचून चुकले, जे उपदेशपर आणि धडा घेण्यासारखे आहे; ईमानवाल्यांसाठी (१२०)

وَقُل لِّلَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ ٱعْمَلُوا۟ عَلَىٰ مَكَانَتِكُمْ إِنَّا عَٰمِلُونَ ﴿١٢١﴾

ईमान न आणणाऱ्यांना सांगून टाका, तुम्ही आपल्या पद्धतीने कर्म करीत रहा. आम्ही पण कर्म करण्यात व्यस्त आहोत. (१२१)

وَٱنتَظِرُوٓا۟ إِنَّا مُنتَظِرُونَ ﴿١٢٢﴾

आणि तुम्ही पण वाट पहा; आम्ही पण वाट पाहत आहोत [१] (१२२)

وَلِلَّهِ غَيْبُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلْأَرْضِ وَإِلَيْهِ يُرْجَعُ ٱلْأَمْرُ كُلُّهُۥ فَٱعْبُدْهُ وَتَوَكَّلْ عَلَيْهِ ۚ وَمَا رَبُّكَ بِغَٰفِلٍ عَمَّا تَعْمَلُونَ ﴿١٢٣﴾

आकाश आणि पृथ्वीतील अदृष्टाचे ज्ञान, अल्लाहतआलालाच आहे. तमाम कामांची दारोमदार पण त्याच्याचकडे आहे, बस! तुला त्याची उपासना (भक्ती) करावयास हवी. आणि त्याच्यावरच भरोसा ठेवला पाहिजे; आणि तुम्ही जे काही करीत आहात; त्यापासून अल्लाहतआला बेसावध नाही. (१२३)







الٓر ۚ تِلْكَ ءَايَٰتُ ٱلْكِتَٰبِ ٱلْمُبِينِ ﴿١﴾

अलीफ–लाम–रा, ही सुबोध पुस्तकाची महावाक्ये आहेत (१)

إِنَّآ أَنزَلْنَٰهُ قُرْءَٰنًا عَرَبِيًّا لَّعَلَّكُمْ تَعْقِلُونَ ﴿٢﴾

खचित्च आम्ही आपणावर या अरबी कुरआनाला अवतरीत केले आहे की, तुम्ही समजू शकावे [२] (२)

نَحْنُ نَقُصُّ عَلَيْكَ أَحْسَنَ ٱلْقَصَصِ بِمَآ أَوْحَيْنَآ إِلَيْكَ هَٰذَا ٱلْقُرْءَانَ وَإِن كُنتَ مِن قَبْلِهِۦ لَمِنَ ٱلْغَٰفِلِينَ ﴿٣﴾

आम्ही आपल्यासमोर एक उत्कृष्ट गोष्ट [३] वर्णन करीत आहोत. या कारणे की आम्ही आपल्याकडे हे कुरआन 'वह्य' च्या मार्फत अवतरीत केले आहे. आणि खचित्च तुम्ही याच्यापूर्वी अजाण लोकांमधून होता [४] (३)

إِذْ قَالَ يُوسُفُ لِأَبِيهِ يَٰٓأَبَتِ إِنِّى رَأَيْتُ أَحَدَ عَشَرَ كَوْكَبًا وَٱلشَّمْسَ وَٱلْقَمَرَ رَأَيْتُهُمْ لِى سَٰجِدِينَ ﴿٤﴾

जेव्हा यूसुफने [५] आपल्या बापाला सांगितले की हे माझ्या पित्या! मी अकरा ताऱ्यांना आणि सूर्याला (व) चंद्राला [६] पाहिले की, ते सर्व मला सजदा करत आहेत. (४)

قَالَ يَٰبُنَىَّ لَا تَقْصُصْ رُءْيَاكَ عَلَىٰٓ إِخْوَتِكَ فَيَكِيدُوا۟ لَكَ كَيْدًا ۖ إِنَّ ٱلشَّيْطَٰنَ لِلْإِنسَٰنِ عَدُوٌّ مُّبِينٌ ﴿٥﴾

याकूबने म्हटले प्रिय मुला, आपल्या या स्वप्नांचा उल्लेख आपल्या भावांजवळ करू नकोस. असे न व्हावे की, ते तुझ्याबरोबर काही फसवणूक करतील;[७] शैतान तर मनुष्याचा खुला दुष्मन आहे.[८] (५)

وَكَذَٰلِكَ يَجْتَبِيكَ رَبُّكَ وَيُعَلِّمُكَ مِن تَأْوِيلِ ٱلْأَحَادِيثِ وَيُتِمُّ نِعْمَتَهُۥ عَلَيْكَ وَعَلَىٰٓ ءَالِ يَعْقُوبَ كَمَآ أَتَمَّهَا عَلَىٰٓ أَبَوَيْكَ مِن قَبْلُ إِبْرَٰهِيمَ وَإِسْحَٰقَ ۚ إِنَّ رَبَّكَ عَلِيمٌ حَكِيمٌ ﴿٦﴾

आणि अशाचप्रकारे [९] तुला तुझा पालनकर्ता निवडून घेईल, आणि तुला दूरदर्शिता (स्वप्नांचे भाकित) पण शिकविल. आणि आपली देणगी तुला भरपूर देईल;[१०] आणि याकूबच्या घराण्यामधून सुद्धा.[११] जसे की त्याने, याच्यापूर्वी, दोन आजोबा म्हणजे इब्राहीम व इस्हाकला सुद्धा आपल्या भरपूर देणग्या दिल्या. खचित्च तुझा पालनकर्ता फारच मोठा वाकबगार आणि बुद्धीमान आहे. (६)

१) म्हणजे लवकरच तुम्हास ठाऊक होऊन जाईल की, चांगला परिणाम कोणाच्या वाट्याला येणार आहे; आणि हे पण ठाऊक होऊन जाईल की, जालीम लोक सफल होणार नाहीत. जसे की हा वायदा लवकरच पूर्ण झाला; आणि अल्लाहतआलाने मुसलमानांना वर्चस्व दिले; संपूर्ण अरब द्विपकल्प, 'इस्लामच्या छत्रछायेखाली येऊन लागला.

२) आकाशी ग्रंथांच्या अवतरणाचा उद्देश्य, लोकांची हिदायत आणि मार्गदर्शन आहे. आणि हा उद्देश्य त्याचवेळी मिळू शकतो; ज्यावेळी ते पुस्तक, त्या भाषेत असावे, जिला ते समजं शकतील. म्हणन प्रत्येक आकाशी पुस्तक त्याच राष्ट्रीय भाषेत अवतरीत झाले, ज्या राष्ट्राच्या मार्गदर्शनार्थ, ते उतारण्यात आले होते. कुरआन करीमचे संबोधित,

प्रथम कारण की, अरब होते, म्हणून कुरआन पण अरबी भाषेत अवतरीत झाले. याशिवाय अरबी भाषा, उत्कृष्ट संभाषण, आणि आपल्या निवेदनात अति उच्च दर्जा आणि उत्कृष्ट निवेदन शैली आणि अर्थपूर्णता, या सर्वांच्य दृष्टीने, जगांतील एक उत्कृष्ट भाषा आहे. म्हणून अल्लाहतआलाने या श्रेष्ठ पुस्तकाला, (कुरआन मजीद) श्रेष्ठ भाषेत (अरबी) श्रेष्ठ पैगंबर (ह.मुहम्मद ﷺ) वर श्रेष्ठ देवदूत (जिब्रईल) च्या मार्फत अवतरीत केले. आणि मक्का, जेथे याचा प्रारंभ झाला, जगातील एक श्रेष्ठ ठिकाण आहे. आणि ज्या महिन्यात याच्या अवतरण्याला सुरवात झाली, तोही श्रेष्ठ महिना, रजमान आहे. आणि यावर ईमान आणणाऱ्या उम्मतला 'खैरे उम्मत' संबोधित केले आहे.

३) 'कसस्' हे 'मसदर' आहे; अर्थ आहे कोण्या गोष्टीच्या मागे लागणे. हे (इक्तसास) कोण्या गोष्टीची रिवायत करणे किंवा (मकसुस) ज्याचा, इरादा केला गेला च्या अर्थांत नाही. (फत्हुल कदीर) अर्थ, मनाला भावणारी घटना आहे. किस्सा केवळ गोष्टीला किंवा, मनघडत कहाणीला म्हणले जात नाही; किंबहुना भूतकाळात होऊन चुकलेल्या घटनेच्या वर्णनाला (म्हणजे याच्या मागे लागण्याला) 'किस्सा' म्हटले जाते. हे जणू भूतकालीन अहवालाचे सत्त्य सत्त्य आणि वास्तविक वर्णन आहे; आणि या गोष्टीत, द्वेष आणि अहंकाराचा परिणाम, अल्लाहच्या समर्थनाची चमत्कारपूर्ण कृती, ऐहिक लज्जतींना चाहणारे मन, आणि शिरजोरीचा परिणाम, आणि दुसऱ्या मानवी जीवनात पुढे येणाऱ्या घटना, संकटे आणि त्रास, यांचे अत्यंत मनोवेधक चित्रण आणि मोठे धडे घेण्यासारखे (घटनेचे) भाग आहेत. म्हणून याला कुरआनाने 'उत्कृष्ट गोष्ट' म्हणून उल्लेखिलेले आहे.

४) कुरआन करीमच्या या शब्दांनी सुद्धा स्पष्ट आहे की, नबी करीम ﷺ, अदृष्टाचे ज्ञाते नव्हते. नाहीतर अल्लाहतआला त्यांना अजाण न ठरवतां. दुसरी गोष्ट ही ठाऊक झाली की, आपण ﷺ अल्लाहचे खरेखुरे पैगंबर आहेत. कारण की, त्यांच्यावर वह्यच्या मार्फतच ही खरी घटना वर्णन करण्यांत आली आहे. आपण ﷺ न कोणाचे शिष्य होते, न कोण्या गुरूकडून शिकवून, सांगून देत असत; न कोण्या आणखी व्यक्तीशी संबंध होता की, ज्याच्याकडून ऐकून इतिहासाची ही घटना, आपल्या महत्त्वाच्या, बारीक सारीक तपशिलासह, आपण ﷺ सांगून टाकते. ही खचित्‌च अल्लाहतआलाने 'वह्य' च्या मार्फत, आपल्यावर ﷺ अवतीर्ण केली आहे. जसे की, याठिकाणी खुलासेवार सांगण्यात आले आहे.

५) म्हणजे हे मोहम्मद! ﷺ आपल्या लोकांसमोर यूसुफची गोष्ट वर्णन करा. जेव्हा त्यांनी आपल्या पित्याला सांगितले; पिता ह.याकूब عليه السلام होते, जसा की, दुसऱ्या ठिकाणी खुलासा आहे. आणि हदीसमध्ये सुद्धा हा वंश वर्णन करण्यात आला आहे. अल्‌करीम इब्नुल करीम, इब्नुल करीम, इब्नुल करीम यूसुफ बिन याकूब, बिन इस्हाक, बिन इब्राहीम. (मुसनद अहमद जिल्द-२ पृ.९६)

६) काही भाष्यकारांनी म्हटले आहे की, अकरा ताऱ्यांनी अभिप्रेत, यूसुफ عليه السلام चे भाऊ आहेत, जे अकराच होते. आणि चंद्र आणि सूर्याने अभिप्रेत, आईवडील आहेत. आणि स्वप्नाचे भाकित चाळीस किंवा ऐंशी वर्षानंतर, त्यावेळी समोर आले, जेव्हा हे सर्व भाऊ, आपल्या आई वडिलांसह, इजिप्तला गेलेत; आणि तेथे ह. यूसुफ عليه السلام च्या समोर नतमस्तक होऊन गेलेत. जसे की हा तपशिल, अध्यायाच्या शेवटी येईल.

७) ह.याकूब عليه السلام नी स्वप्नांने अंदाज बांधला की, त्यांचा हा मुलगा, मोठ्या शानवाला होईल; यासाठी त्यांना भय वाटले की, हे स्वप्न ऐकून याचे दुसरे भाऊपण त्याच्या मोठेपणाचा अंदाज करून, कुठे त्याला नुकसान न पोहोचवो. म्हणून त्यांनी त्या स्वप्नांचा उल्लेख करण्यांस मनाई केली.

८) हे भावांच्या फसवणूक आणि धोकेबाजीचे कारण सांगून दिले की, शैतान कारण की, माणसाचा पहिल्यापासून शत्रू आहे. म्हणून तो माणसांना बहकविणे, मार्गभ्रष्ट करणे, आणि त्यांना द्वेषांत व्यस्त करण्यांत, नेहमी प्रयत्नशील आणि संधीची वाट पाहत असतो. जसे की, ही शैतानासाठी मोठी नामी संधी होती की, त्याने यूसुफ عليه السلام च्या विरूद्ध, भावांच्या मनात मत्सर आणि द्वेषाची आग भडकवून द्यावी. जसे की नंतर, वास्तविक त्याने असेच केले. आणि ह.याकूब عليه السلام ची भीती सार्थ ठरली.

९) म्हणजे ज्याप्रमाणे तुला तुझ्या पालनकर्त्याने, फारच उच्च दर्जाचे स्वप्न दाखविण्याकरीता निवडून घेतले; अशाचप्रकारे तुझा पालनकर्ता तुला श्रेष्ठत्वपण प्रदान करील; आणि स्वप्नांचे भाकीत शिकवील.

१०) याच्याने अभिप्रेत पैगंबरी आहे, जी ह.यूसुफ عليه السلام ला प्रदान करण्यात आली. किंवा ते इनाम आहेत, जे इजिप्तमध्ये ह.यूसुफ عليه السلام ला देण्यात आले.

११) याच्याने अभिप्रेत ह.यूसुफ عليه السلام चे भाऊ, त्यांची संतती वगैरे आहेत. जे नंतर, अल्लाहच्या इनामांनी लाभान्वयीत झाले.

لَقَدْ كَانَ فِىْ يُوسُفَ وَاِخْوَتِهٖۤ اٰيٰتٌ لِّلسَّآئِلِيْنَ ۝٧

**खचित्च यूसुफ आणि त्याच्या भावांमध्ये, विचारणाऱ्यांसाठी, मोठ्या मोठ्या निशाण्या आहेत.[१] ७**

اِذْ قَالُوْا لَيُوْسُفُ وَ اَخُوْهُ اَحَبُّ اِلٰٓى اَبِيْنَا مِنَّا وَنَحْنُ عُصْبَةٌ ؕ اِنَّ اَبَانَا لَفِىْ ضَلٰلٍ مُّبِيْنِ ۝٨

**जेव्हा त्यांनी म्हटले की, यूसुफ आणि त्यांचा भाऊ[२]. आमच्या तुलनेत, आमच्या पित्याला फारच जास्त प्रिय आहेत. वास्तविक आम्ही एक (शक्तीवान) समूह[३] आहोत. काही शंका नाही की, आमचा बाप धडधडीत चुकीत आहे.[४] ८**

اِۨقْتُلُوْا يُوْسُفَ اَوِ اطْرَحُوْهُ اَرْضًا يَّخْلُ لَكُمْ وَجْهُ اَبِيْكُمْ وَتَكُوْنُوْا مِنْۢ بَعْدِهٖ قَوْمًا صٰلِحِيْنَ ۝٩

**यूसुफला तर मारूनच टाका. किंवा त्याला (अज्ञातस्थळी) पोहचवून द्या. की, तुमच्या बापाचा रोख, निव्वळ तुमच्याकडेच होऊन जाईन. यानंतर तुम्ही सदाचरणी होऊन जा.[५] ९**

قَالَ قَآئِلٌ مِّنْهُمْ لَا تَقْتُلُوْا يُوْسُفَ وَاَلْقُوْهُ فِىْ غَيٰبَتِ الْجُبِّ يَلْتَقِطْهُ بَعْضُ السَّيَّارَةِ اِنْ كُنْتُمْ فٰعِلِيْنَ ۝١٠

**यांच्यातून एकाने म्हटले, यूसुफला ठार तर मारू नका, किंबहुना त्याला कोण्या खोल कोरड्या विहीरीत टाकून[६] द्या; की त्यांला कोणी रस्त्याने जाणारा, काफला काढून घेईल; तर तुम्हास करावयाचेच असेल तर असे करा[७] १०**

قَالُوْا يٰۤاَبَانَا مَالَكَ لَا تَاْمَنَّا عَلٰى يُوْسُفَ وَاِنَّا لَهٗ لَنٰصِحُوْنَ ۝١١

**त्यांनी म्हटले की हे आमच्या पित्या! शेवटी तुम्ही यूसुफाच्या बाबतीत आमच्यावर विश्वास का करीत नाही, आम्ही तर त्यांचे भले इच्छिणारे आहोत[८] ११**

१) म्हणजे या घटनेत, अल्लाहतआलाचे मोठे सामर्थ्य, आणि नबी करीम ﷺ च्या पैगंबरीच्या सत्यतेच्या मोठ्या निशाण्या आहेत. काही भाष्यकारांनी येथे त्या भावांची नावे आणि त्यांचा तपशिलपण वर्णन केला आहे. रूबेल, शमऊन, लावी, यहूदा, रयालून, यशजर, दान, नफताली, जाद आणि अशर. त्यांची आई, लिया बिन्ते लियान, होती. जी ह.याकूब عليه السلام .च्या मावशीची मुलगी होती. त्यांच्या मृत्यूनंतर, ह.याकूब عليه السلام नी त्यांची बहीण राहिलशी लग्न करून घतले. ज्यांच्यापासून यूसुफ आणि बिन्यामीन जन्माला आलेत. आणि काहींनी म्हटले आहे की, राहीलकडून फक्त बिन्यामीन झाले; आणि याच्यानंतर 'वक्फ' नावाच्या स्त्रीशी, ह.याकूब عليه السلام चे लग्न झाले, जिच्यापासून यूसुफ जन्माला आले. (फत्हुल कदीर) वल्लाह अअलम्!

२) त्याच्याभावाने अभिप्रेत बिन्यामीन आहे. कारण की त्यांची आई दुसरी होती. जसा की मागे खुलासा होऊन चुकला.

३) म्हणजे आम्ही दहा भाऊ, एक शक्तीशाली समूह, आणि संख्या बाहुल्यात आहोत; जेव्हा की यूसुफ आणि बिनयामीन (ज्यांची आई किंवा आया वेगळ्या होत्या.) फक्त दोन आहेत. असे असून सुद्धा बापाच्या डोळ्यांची थंडक आणि मनाची ओढ त्यांच्याकडे आहे.

४) येथे जलालने अभिप्रेत ती चूक आहे; जी यांच्या कल्पनेप्रमाणे बापाकडून यूसुफ आणि बिन्यामिन शी जास्त प्रेमाच्या स्वरूपांत सादर झाली.

५) याच्याने अभिप्रेत पश्चात्ताप व्यक्त करणारे, होऊन जाणे आहे. म्हणजे विहीरीत टाकून, किंवा ठार करून, अल्लाहकडे या गुन्ह्याकरीता तौबा करून घेऊ.

६) 'जुब्ब' विहीरीला, आणि 'गयाबतून' तिच्या तळाला आणि खोलीला, म्हणतात. विहीर तशी पण खोलच असते. आणि तिच्यांत पडलेली वस्तू कोणास दिसत नाही. जेव्हा याच्याबरोबर विहीरीच्या खोलीचा पण उल्लेख केला तर जणू अतिशयोक्ती केली.

७) म्हणजे येणारे जाणारे काफले आणि प्रवासी, जेव्हा पाण्याच्या शोधात विहीरीवर येतील, तर शक्य आहे की, कोणांस ठाऊक होऊन जाईल की, विहीरीत कोणी मनुष्य पडलेला आहे; आणि तो त्याला काढून आपल्या बरोबर घेऊन जाईल. ही युक्ती एका भावाने, दया म्हणून पुढे केली. ठार करण्याच्या तुलनेत, ही युक्ती खरोखरच, सहानुभूतीची भावना दर्शविते. भावांचा, द्वेषाग्नी इतका भडकला होता की, ही युक्ती पण त्याने भित भितच सादर केली; की जर तुम्हास काही करावयाचेच आहे, तर हे काम अशा प्रकारे करा.

८) याच्याने असे वाटते की, कदाचित याच्यापूर्वी सुद्धा, यूसुफच्या भावांनी, यूसुफला आपल्याबरोबर घेऊन जाण्याचा प्रयत्न केला असेल, आणि बापाने नकार दिला असेल.

ارسله معنا غدا يرتع ويلعب وانا له لحفظون ﴿١٢﴾

**उद्या, आपण त्याला अवश्य, आमच्याबरोबर पाठवून द्या. की (त्याने) खूप खावे, प्यावे, आणि खेळावे; [१] आणि त्याच्या संरक्षणाला आम्ही जबाबदार आहोत ⑫**

قال اني ليحزنني ان تذهبوا به واخاف ان ياكله الذئب وانتم عنه غفلون ﴿١٣﴾

**(याकूबने) म्हटले, त्याला तुमचे घेऊन जाणे तर मला फारच दु:ख देईल. आणि मला हा अंदेशा लागून राहील की, कोठे तुमच्या निष्काळजीपणामुळे, त्याला लांडगा खाऊन जाईल. ⑬**

قالوا لئن اكله الذئب ونحن عصبة انا اذا لخسرون ﴿١٤﴾

**त्यांनी उत्तर दिले की, आमच्या सारख्या (शक्तीशाली) समूहाच्या उपस्थितीत सुद्धा, जर त्याला लांडगा खाऊन टाकेल, तर आम्ही फारच नेमळट [२] ठरून गेलो ⑭**

فلما ذهبوا به واجمعوا ان يجعلوه في غيبت الجب واوحينا اليه لتنبئنهم بامرهم هذا وهم لا يشعرون ﴿١٥﴾

**मग जेव्हा त्याला घेऊन चालले, आणि सर्वांनी मिळून ठरवून टाकले की, याला एखाद्या खोल कोरड्या विहीरीत तळांत टाकून द्यावे; आम्ही यूसुफकडे वह्य केले की,( नक्कीच तो वेळ येत आहे) तू त्यांना यांचे हे प्रकरण, या स्थितीत जतवून देशील की, ते तुला ओळखत नसतील; [३] ⑮**

وجاءو اباهم عشاء يبكون ﴿١٦﴾

**आणि ईशाच्या वेळी, (ते सर्व) आपल्या बापाकडे, रडत रडत येऊन पोहोचले. ⑯**

قالوا يابانا انا ذهبنا نستبق وتركنا يوسف عند متاعنا فاكله الذئب وما انت بمؤمن لنا ولو كنا صدقين ﴿١٧﴾

**आणि म्हणू लागले की हे आमच्या पित्या! आम्ही तर आपसात दौड मारू लागण्यात, लागून गेलो, आणि यूसुफला आम्ही सामानाजवळ सोडून दिले; तर मग त्याला लांगड्याने खाऊन टाकले. तुम्ही तर आमच्या गोष्टीवर विश्वास करणार नाही, जरी आम्ही बिलकुल खरे (सच्चे) असू [४] ⑰**

१) खेळ आणि सहलीची आवड, माणसाच्या स्वभावातच आहे. म्हणूनच योग्य खेळ आणि सहलींना, अल्लाहतआलाने कुठल्याही काळांत, बंदी केली नाही. इस्लाममध्ये सुद्धा यांची परवानगी आहे; परंतु सशर्त! म्हणजे असे खेळ आणि मनोरंजन योग्य आहेत, ज्यांच्यात धर्म शास्त्रीय निषिद्धता नसावी. किंवा निषिद्धतेपर्यंत पोहचण्याचे साधन बनू नये. जसे की, ह.याकूब عليه السلام नी सुद्धा खेळण्या कुदण्याच्या मर्यादेपर्यंत काही आक्षेप घेतला नाही. तथापि हा अंदेशा जाहीर केला की, तुम्ही खेळण्यात मस्त राहाल, आणि त्याला लांडगा खाऊन जाईल. कारण की, खुल्या मैदानात आणि जंगलात तेथे लांडगे सर्वत्र आढळत असत.
२) ही बापाला खात्री देण्यात येत आहे की, असे कसे होऊ शकते? की आम्हा सर्व भावांच्या उपस्थितीत, लांडग्याने यूसुफला खाऊन टाकावे!
३) कुरआन करीम फारच, थोड्या शब्दांत घटना वर्णन करीत आहे. अर्थ असा की, जेव्हा आपल्या विचारपूर्वक केलेल्या योजनेप्रमाणे, त्यांनी यूसुफला विहीरीत फेंकून दिले, तेव्हा अल्लाहतआलाने ह.यूसुफ عليه السلام ला सांत्वन आणि हिंमतीसाठी 'वह्य' केले की, घाबरण्याची आवश्यकता नाही; आम्ही तुझे संरक्षणच करणार नाही, किंबहुना तुला अशा उच्च स्थानी स्थानापन्न करू, की हे भाऊ दारिद्र्यपीड़ित होऊन, तुझ्या सेवेत हजर होतील; आणि मग तू त्यांना दाखवशील की, तुम्ही आपल्या एका भावाबरोबर अशा प्रकारचा निष्ठुर मामला केला होता. ज्याला ऐकून ते आश्चर्यचकीत आणि लज्जीत होऊन जातील. ह.यूसुफ عليه السلام जरी यावेळी मूल होते, परंतु जी मुले, पैगंबरीपदावर पोहचणारी असतील, त्यांच्यावर लहानपणी सुद्धा 'वह्य' येऊन जाते. जसे ह.ईसा अ. आणि ह.यह्या عليه السلام वगैरेंवर आले.
४) म्हणजे जर आम्ही आपल्याजवळ प्रतिष्ठीत आणि सत्यवादी असतो, तरी सुद्धा यूसुफच्या मामल्यात, तुम्ही आम्हाला मान्य केले नसते. आतातर तसे सुध्दा, आमची स्थितीज्याच्यावर आळ घेण्यात आला आहे, आणि शंका घेण्यात आली आहे, अशा माणसासारखी आहे. आता तुम्ही कशाप्रकारे आमच्या गोष्टीला मान्य करून घेणार?

وَجَآءُوْ عَلٰى قَمِيْصِهٖ بِدَمٍ كَذِبٍ ؕ قَالَ بَلْ سَوَّلَتْ لَكُمْ اَنْفُسُكُمْ اَمْرًا ؕ فَصَبْرٌ جَمِيْلٌ ؕ وَاللّٰهُ الْمُسْتَعَانُ عَلٰى مَا تَصِفُوْنَ ﴿١٨﴾

**आणि यूसुफच्या सदऱ्याला झुटमुटचे रक्तपण लावून आणले होते; पित्याने म्हटले, असे नाही! किंबहुना, तुम्ही आपल्या मनानेच एक गोष्ट रचली आहे. असो, सबुरी चांगली[१] आहे. आणि तुमच्या रचलेल्या गोष्टींवर, अल्लाहकडूनच, मदतीची अपेक्षा आहे.[२] (१८)**

وَجَآءَتْ سَيَّارَةٌ فَاَرْسَلُوْا وَارِدَهُمْ فَاَدْلٰى دَلْوَهٗ ؕ قَالَ يٰبُشْرٰى هٰذَا غُلٰمٌ ؕ وَاَسَرُّوْهُ بِضَاعَةً ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌ بِمَا يَعْمَلُوْنَ ﴿١٩﴾

**आणि एक काफला आला; आणि त्यांनी आपल्या पाणी आणणाऱ्यांला पाठविले. मग त्याने आपला डोल आंत सोडून दिला. म्हणू लागला वा! वा!! किती आनंदाची गोष्ट आहे, हा तर एक नवतरूण मुलगा आहे. [३] त्यांनी त्याला व्यापारी माल ठरवून लपवून [४] दिले. आणि अल्लाहतआला हे सर्व काही जाणत होता; ते जे काही करीत [५] होते (१९)**

وَشَرَوْهُ بِثَمَنٍۢ بَخْسٍ دَرَاهِمَ مَعْدُوْدَةٍ ۚ وَكَانُوْا فِيْهِ مِنَ الزّٰهِدِيْنَ ﴿٢٠﴾

**आणि त्यांनी [६] त्याला फारच कमी किंमतीत, मोजक्या काही दिरहमांवरच विकून टाकले. त्यांना तर यूसुफाच्या बाबतीत, काही जास्त आवळ नव्हती [७] (२०)**

وَقَالَ الَّذِى اشْتَرٰىهُ مِنْ مِّصْرَ لِامْرَاَتِهٖۤ اَكْرِمِىْ مَثْوٰىهُ عَسٰٓى اَنْ يَّنْفَعَنَاۤ اَوْ نَتَّخِذَهٗ وَلَدًا ؕ وَكَذٰلِكَ مَكَّنَّا لِيُوْسُفَ فِى الْاَرْضِ ۖ وَلِنُعَلِّمَهٗ مِنْ تَاْوِيْلِ الْاَحَادِيْثِ ؕ وَاللّٰهُ غَالِبٌ عَلٰۤى اَمْرِهٖ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُوْنَ ﴿٢١﴾

**आणि इजिप्तवाल्या मधून ज्याने त्याला विकत घेतले होते, त्याने आपल्या पत्नीला [८] सांगितले, की याला मोठ्या मानसन्मानाने ठेवा. फार शक्य आहे की, तो आम्हाला काही फायदा पोहोचवील; किंवा त्याला आम्ही आमचा पुत्रच बनवून घेऊ; अशाप्रकारे आम्ही इजिप्तच्या भूमीत, यूसुफाची स्थापना [९] केली, की आम्ही त्याला स्वप्नाच्या भाकीताचे काही ज्ञान, शिकवून द्यावे. आणि अल्लाह आपल्या हेतुत समर्थ आहे; परंतु बहुतेक लोक जाणीत नाही. (२१)**

وَلَمَّا بَلَغَ اَشُدَّهٗۤ اٰتَيْنٰهُ حُكْمًا وَّعِلْمًا ؕ وَكَذٰلِكَ نَجْزِى الْمُحْسِنِيْنَ ﴿٢٢﴾

**आणि जेव्हा (यूसुफ) आपल्या भरजवानीस पोहचले, आम्ही त्यांस शहाणपण आणि ज्ञान दिले. [१०] आम्ही सदाचरणी लोकांना असाच बदला देत असतो. (२२)**

وَرَاوَدَتْهُ الَّتِىْ هُوَ فِىْ بَيْتِهَا عَنْ نَّفْسِهٖ وَغَلَّقَتِ الْاَبْوَابَ وَقَالَتْ هَيْتَ لَكَ ؕ قَالَ مَعَاذَ اللّٰهِ اِنَّهٗ رَبِّىْۤ اَحْسَنَ مَثْوَاىَ ؕ اِنَّهٗ لَا يُفْلِحُ الظّٰلِمُوْنَ ﴿٢٣﴾

**आणि त्या स्त्रीने, जिच्या घरात, यूसुफ होते, यूसुफावर आपली मोहिनी घालू लागली, की त्याने आपल्या मनांचा संयम सोडून द्यावा; आणि (घराचे) दरवाजे बंद करून म्हणू लागली की, चल ये! यूसुफ म्हणाले, अल्लाहची पनाह! तो माझा पालनहार आहे. त्याने माझा फार चांगल्याप्रकारे सांभाळ केला आहे. नि:संशय जालिम लोक सफल होत नाही[११] (२३)**

१) असे म्हणतात की, एका बकरीच्या पिलाला मारून, यूसुफचा सदरा त्याच्या रक्तांत माखविण्यात आला; आणि हे विसरून गेले की, जर लांडग्याने यूसुफला खाल्ले असते, तर सदरा पण फाटला असता; सदरा जसाचा तसाच होता. त्याला पाहून, त्याशिवाय ह.यूसुफ عليه السلام चे स्वप्न आणि पैगंबरीची दूरदर्शिताने अंदाज घेऊन, ह.याकूब عليه السلام नी म्हटले, ही घटना अशी घडलेली नाही, जसे तुम्ही सांगत आहांत. परंतु तुम्ही आपल्या मनानेच ही गोष्ट रचली आहे. तथापि, कारण की, जे व्हावयाचे होते, ते होऊन चुकले होते. ह.याकूब عليه السلام या तपशिलापासून अजाण होते; म्हणून सहनशिलतेशिवाय, काही उपाय, आणि अल्लाहच्या मदतीशिवाय, कुणाचा आश्रय नव्हता.

२) दांभिकांनी जेव्हा ह.आयेशा رضي الله عنها वर आळ घेतला, तेव्हा त्यांनी सुद्धा, नबी ﷺ च्या समज आणि म्हणण्याच्या उत्तरांत, म्हटले होते, ''अल्लाहची शपथ! मी आपल्या आणि तुम्हा लोकांसाठी तेच उदाहरण पाहते, ज्याच्याशी ह.यूसुफ عليه السلام चे वडील ह.याकूब عليه السلام यांना सामोरे जावे लागले होते. आणि त्यांनी 'फसबरुन जमील' म्हणून सहनशिलतेचा मार्ग पत्करला होता.'' (स.बुखारी तफसीर सू.यूसुफ.) म्हणजे माझ्यासाठी सुद्धा सहन करण्याशिवाय काही उपाय नाही.

३) 'वारिद' त्या माणसाला म्हणतात, जो काफिल्यासाठी पाणी वगैरेची व्यवस्था करण्याच्या हेतुने, काफिल्याच्या पुढे पुढे चालतो. कारण की योग्य जागा पाहून, काफिल्यांला थांबविले जाऊ शकेल. हा वारिद (काफल्यासाठी, पाणी आणणारा) जेव्हा विहीरीवर आला; आणि त्याने डोल विहीरीत टाकला; तेव्हा ह.यूसुफ عليه السلام नी त्याची दोरी धरुन घेतली. वारिदने जेव्हा एक सुस्वरुप मुलगा पाहिला तर त्याने त्याला वर काढून घेतले. आणि खूप आनंदित झाला.

४) 'बिजाअतन्' व्यापाराच्या सामानाला म्हणतात. 'असर्रूहु' चा 'फाईल' कोण आहे?महणजे यूसुफला व्यापाराचा माल समजून लपवून ठेवणार कोण आहे? यात मतभेद आहे. हाफीज इब्ने कसीर ने, यूसुफ عليه السلام च्या भावांना 'फाईल' ठरविले आहे. अर्थ हा आहे की, जेव्हा डोलाबरोबर ह.यूसुफ عليه السلام पण विहीरीबाहेर निघून आले, तेव्हा हे भाऊ सुद्धा तेथे उपस्थित होते. तथापि त्यांनी खऱ्या वस्तुस्थितीला लपवून ठेवले, असे सांगितले नाही की, हा आमचा भाऊ आहे. आणि ह.यूसुफ عليه السلام नी सुद्धा, ठार मारून टाकण्याच्या भीतीने, आपण भाऊ असल्याचे जाहीर केले नाही.किंबहुना भावांनी, त्यांना विक्रीची वस्तू ठरविले तेव्हा गुपचूप बसले, आणि आपले विक्री होणे पसंत केले. जसे की या वारिदने, काफिल्यावाल्यांना खुषखबर दिली की, एक मुलगा विक्री होत आहे. परंतु ही गोष्ट विषयानुसार जुळत नाही, याच्या उलट इमाम शौकानीने ''असर्रूहु'' चा फाईल वारिद आणि त्याच्या साथीदारांना ठरविले आहे. कारण की त्यांनी हे जाहीर केले नाही की, हा मुलगा विहीरीतून निघाला आहे. कारण की, अशाप्रकारे सर्व काफल्यावाले, त्या 'व्यापारीमालांत' शामील झाले असते. किंबहुना त्यांनी काफल्यांवाल्यांना जाऊन असे सांगितले की, विहीरीच्या मालकांनी, हा मुलगा त्यांच्या हवाली केला आहे, की त्यांनी इजिप्तला जाऊन त्याला विकून टाकावे. परंतु फारच जवळची गोष्ट ही आहे की, काफल्यावाल्यांनी मुलाला व्यापारी माल ठरवून लपवून दिले; की कोठे त्याचे नातेवाईक त्याच्या शोधांत (येथे) येऊन न पोहचावे. आणि अशाप्रकारे फायद्या ऐवजी नुकसान होऊन जावे; कारण की लहान मुलगा असणे आणि विहीरीत आढळून येणे, या गोष्टीची निशाणी आहे की, तो येथे जवळपासचाच राहणारा आहे. आणि खेळत कुदत विहीरीत येऊन पडला आहे.

५) म्हणजे ह.यूसुफ عليه السلام बरोबर जे काही होत होते, अल्लाहला त्याचे ज्ञान होते. परंतु अल्लाहने हे सर्वकाही यासाठी होऊ दिले की, अल्लाहच्या इच्छेप्रमाणे काम व्हावे. याशिवाय याच्यांत रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमसाठी इशारा आहे; म्हणजे अल्लाहतआला आपल्या पैगंबरांना दाखवित आहे की, आपल्या समाजाचे लोक खचित्‌च इजा पोहचवित आहेत; आणि मी त्यांना यापासून ऐकण्यावर समर्थपण आहे. परंतु मी अशाप्रकारे त्यांना अवकाश देत आहे, ज्याप्रमाणे यूसुफच्या भावांना,अवकाश दिला होता. आणि मग सरशेवटी मी, ह.यूसुफ عليه السلام ला इजिप्तच्या सिंहासनावर विराजमान केले. आणि त्याच्या भावांना मोहताज आणि लाचार करून, त्याच्या दरबारांत हजर करून दिले. हे पैगंबरा ! एक वेळ अशी येईल की, आपण सुद्धा अशाच प्रकारे विजयी व्हाल; कुरैशचे सरदार आपल्या आज्ञेची वाट पाहत असतील. जसे की, मक्केच्या विजयाच्या प्रसंगी, हा वेळ लवकरच येऊन ठेपला.

६) दुसऱ्या भाष्यानुसार, काफल्यावाल्यांनी विकले.

७) कारण की पडलेली, सांपडलेली वस्तू. माणसाला अशीच, कुठल्याही श्रमाशिवाय मिळून जाते; म्हणून ती कितीही किंमती असली, तरी तिचे बरोबर महत्त्व आणि मूल्य, माणसाला स्पष्ट होत नाही.

८) असे म्हणतात की, इजिप्तवर त्यावेळी, रय्यान बिन वलीद, सत्ताधिश होता. आणि हा 'अजीजे मिस्र', ज्याने यूसुफला खरिदले, त्याचा अर्थमंत्री होता. त्याच्या पत्नीचे नाव काहींनी 'राईल' आणि काहींनी 'जुलेखा' सांगितले आहे. वल्लाह अअ्लम!

९) म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही यूसुफला विहीरीतून आणि निर्दयी भावांपासून सुटका दिली, अशाचप्रकारे आम्ही यूसुफला इजिप्तच्या भूमीत, एक संपूर्ण विश्रामाचे स्थान प्रदान केले.

१०) म्हणजे पैगंबरी किंवा पैगंबरीच्या पूर्वी, शहाणपण आणि निर्णयशक्ती.

११) येथून ह.यूसुफ عليه السلام ची एक नवी परीक्षा सुरू झाली. अजीजे मिस्रची पत्नी, जिला तिच्या पतीने ताकीद दिली होती की, यूसुफला आदर सन्मानाने ठेव; ती ह.यूसुफ عليه السلام च्या रूप सौंदर्यावर भाळली. आणि त्यांना कुकर्माचे आमंत्रण देऊ लागली. ज्याला ह.यूसुफ عليه السلام नी ठोकरून लावले.

وَلَقَدْ هَمَّتْ بِهٖ ۚ وَهَمَّ بِهَا لَوْلَآ اَنْ رَّاٰ بُرْهَانَ رَبِّهٖ ؕ كَذٰلِكَ لِنَصْرِفَ عَنْهُ السُّوْٓءَ وَالْفَحْشَآءَ ؕ اِنَّهٗ مِنْ عِبَادِنَا الْمُخْلَصِيْنَ ﴿٢٤﴾

**आणि त्या स्त्रीने यूसुफकडे संकल्प केला आणि [१] त्या देखील यूसुफ तिच्याकडे सरसावला असता जर त्याने आपल्या पालनकर्त्याचे प्रमाण पाहिले[२] नसते. झाले ही असेच,..यासाठी की आम्ही त्याच्यापासून, कुकर्म आणि निर्लज्जता दूर करावी;[३] नि:संशय तो आमच्या निवडक सेवकांमधून होता. (२४)**

وَاسْتَبَقَا الْبَابَ وَقَدَّتْ قَمِيْصَهٗ مِنْ دُبُرٍ وَّاَلْفَيَا سَيِّدَهَا لَدَا الْبَابِ ؕ قَالَتْ مَا جَزَآءُ مَنْ اَرَادَ بِاَهْلِكَ سُوْٓءًا اِلَّآ اَنْ يُّسْجَنَ اَوْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٢٥﴾

**आणि दोघे दरवाज्याकडे पळाले; [४] आणि त्या स्त्रीने, यूसुफचा सदरा, मागच्या बाजूने, ओढून फाडून टाकला; आणि दरवाज्याच्या जवळच, स्त्रीचा पती, दोघांना मिळाला तेव्हा ती म्हणू लागली, जो मनुष्य, तुझ्या पत्नी बरोबर, वाईट इरादा करेल,तर त्याची शिक्षा हीच आहे की, त्याला तुरुंगात टाकण्यात यावे, किंवा आणखी कोणती दु:ख दायक शिक्षा दिली जावी.[५] (२५)**

१) हे भाषांतर बहुतेक भाष्यकारांच्या प्रमाणे आहे; आणि ज्या लोकांनी याला 'लौला' च्या बरोबर जोडून, हा अर्थ सांगितला आहे की, यूसुफने, मनात निश्चयच केला नाही. या भाष्यकारांनी याला, अरबी रितीच्या विरूद्ध ठरविले आहे. आणि हा अर्थ सांगितला आहे की, मनांत इरादा तर यूसुफने पण करून घेतला होता; परंतु हा एक तर हेतू पुरस्कर नव्हता. अजीजे मिस्रच्या पत्नीचे प्रोत्साहन, आणि दबाव, यात शामील होता. दुसरे असे की, गुन्ह्याचा इरादा करून घेणे, सदाचरणाच्या विरूद्ध नाही. यावर कर्म करणे सदाचरणाच्या विरूद्ध आहे. (फत्हुल कदीर, इब्ने कसीर) परंतु छान बिन करणाऱ्या, भाष्यवाल्यांनी हा अर्थ केला आहे की, यूसुफ عليه السلام पण याचा इरादा करून घेते, जर आपल्या पालनकर्त्याकडून प्रमाण पाहून न घेते. म्हणजे त्यांनी आपल्या पालनकर्त्याकडून प्रमाण पाहून घेतले होते. म्हणून अजीजे मिस्रच्या पत्नीचा इरादाच केला नाही. किंबहुना गुन्ह्याचे आमंत्रण मिळताच, बोलून पडले, ''मआजल्लाह् ! तथापि इरादा न करण्याचा हा अर्थ नाही की मनांत उत्साह आणि ते काम करण्याची इच्छा, निर्माणच झाली नाही; उत्साह आणि काम करण्याची इच्छा, निर्माण होणे वेगळी गोष्ट आहे. आणि कामेच्छा करणे वेगळी गोष्ट आहे. आणि वास्तव हे आहे की, जर सुरवातीपासून जोश आणि कामेच्छा निर्माणच होणार नाही, तर अशा व्यक्तीचे पापापासून वांचून जाणे, काही कमाल नाही. कमाल तर तेव्हाच आहे, की मनात चुळबुळ आणि कामेच्छा निर्माण व्हावी, आणि मग माणसाने त्याला आवर घालावा; आणि पापापासून वाचूंन जावे. ह.यूसुफ عليه السلام नी याच सहनशिलतेचा आणि मनाच्या निर्धारांचा (कंट्रोल) अनोखा नमुना सादर केला.

२) येथे पहिल्या भाष्याच्या आधारावर, 'लौला' चे उत्तर 'महजुफ' आहे. ''लफअला मा हम्म बिही'' म्हणजे जर यूसुफ عليه السلام पालनकर्त्याचे प्रमाण न पाहते, तर इराद्याप्रमाणे करून टाकते. हे प्रमाण काय होते? यात वेगवेगळी कथने आहेत. अर्थ असा आहे की, पालनकर्त्याकडून कोणी अशी गोष्ट, आपणांस दाखविण्यात आली की, तिला पाहून, मनाच्या इच्छेला दाबण्यांत, आणि तिला रद्द करण्यात, यशस्वी होऊन गेले. अल्लाहतआला अशाचप्रकारे आपल्या पैगंबराचे संरक्षण करीत असतो.

३) म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही ह.यूसुफ عليه السلام ला प्रमाण दाखवून, वाईट कर्म किंवा त्याच्या इराद्यापासून वांचवून घेतले, अशाच प्रकारे आम्ही त्याला प्रत्येक प्रकरणात, वाईट कृत्ये आणि निर्लज्जपणाच्या गोष्टींपासून, दूर ठेवण्याची व्यवस्था केली. कारण की तो आमच्या निवडक सेवकांमधून होता.

४) जेव्हा ह.यूसुफ عليه السلام नी पाहिले, की ती स्त्री कुकृत्ये करण्यावर अडीग आहे, तर ते बाहेर निघण्याकरता, दरवाज्याकडे पळाले, ह.यूसुफ عليه السلام च्या मागे त्यांना धरण्यासाठी, ती स्त्री पण पळाली. अशाप्रकारे दोघे दरवाज्याकडे धावले.

५) म्हणजे नवऱ्याला पाहताच स्वत: निष्पाप बनून गेली; आणि अपराधी संपूर्णपणे, यूसुफला ठरवून, त्यांच्याकरीता शिक्षेची पण मागणी केली. वास्तविक वस्तुस्थिती याच्या नेमकी उलट होती. अपराधी स्वत: होती, जेव्हा की ह.यूसुफ عليه السلام पूर्ण निर्दोष आणि या वाईट कृत्यापासून वांचण्याचे इच्छुक, आणि त्याच्यासाठी प्रयत्नशिल होते.

قَالَ هِيَ رَاوَدَتْنِي عَن نَّفْسِي وَشَهِدَ شَاهِدٌ مِّنْ أَهْلِهَا إِن كَانَ قَمِيصُهُ قُدَّ مِن قُبُلٍ فَصَدَقَتْ وَهُوَ مِنَ الْكَاذِبِينَ ﴿٢٦﴾

यूसुफने म्हटले, ही स्त्रीच मला फुस लावून, मनाच्या संरक्षणापासून गाफील करू इच्छित होती;[१] आणि स्त्रीच्याच कुटुंबातून एका[२] मनुष्याने साक्ष दिली की, जर त्याचा सदरा पुढून फाटलेला असेल, तर स्त्री खरी आहे, आणि यूसुफ, खोटे बोलणाऱ्यांमधून आहे. (२६)

وَإِن كَانَ قَمِيصُهُ قُدَّ مِن دُبُرٍ فَكَذَبَتْ وَهُوَ مِنَ الصَّادِقِينَ ﴿٢٧﴾

आणि जर त्याचा सदरा मागच्या बाजूने फाडण्यात आला आहे, तर स्त्री, खोटी, आणि यूसुफ खऱ्यांपैकी आहे. (२७)

فَلَمَّا رَأَىٰ قَمِيصَهُ قُدَّ مِن دُبُرٍ قَالَ إِنَّهُ مِن كَيْدِكُنَّ ۖ إِنَّ كَيْدَكُنَّ عَظِيمٌ ﴿٢٨﴾

पतीने जेव्हा पाहिले की, यूसुफचा सदरा, पाठीच्या बाजूने फाडण्यात आला आहे, तेव्हा स्पष्ट सांगून टाकले की ही तर तुम्हा स्त्रीयांची चाल आहे, नि:संशय तुमच्या हाथकंड्या फारच भारी असतात[३] (२८)

يُوسُفُ أَعْرِضْ عَنْ هَٰذَا ۚ وَاسْتَغْفِرِي لِذَنبِكِ ۖ إِنَّكِ كُنتِ مِنَ الْخَاطِئِينَ ﴿٢٩﴾

यूसुफ! आता या गोष्टीला विसरून जा.[४] आणि (हे स्त्रीये)! तू आपल्या पापाचा पश्चात्ताप व्यक्त कर, नि:संशय तू गुन्हेगारांमधून आहेस[५] (२९)

وَقَالَ نِسْوَةٌ فِي الْمَدِينَةِ امْرَأَتُ الْعَزِيزِ تُرَاوِدُ فَتَاهَا عَن نَّفْسِهِ ۖ قَدْ شَغَفَهَا حُبًّا ۖ إِنَّا لَنَرَاهَا فِي ضَلَالٍ مُّبِينٍ ﴿٣٠﴾

आणि शहरातील स्त्रीयांत चर्चा होऊ लागली की, अजीजची बायको, आपल्या (तरूण) गुलामाला, आपले काम साध्य करण्यासाठी, फुसलावण्यामध्ये व्यस्त असते. तिच्या मनात यूसुफचे प्रेम, घर करून, बसले आहे; आमच्या दृष्टीने तर ती धडधडीत चुकीत आहे.[६] (३०)

فَلَمَّا سَمِعَتْ بِمَكْرِهِنَّ أَرْسَلَتْ إِلَيْهِنَّ وَأَعْتَدَتْ لَهُنَّ مُتَّكَأً وَآتَتْ كُلَّ وَاحِدَةٍ مِّنْهُنَّ سِكِّينًا وَقَالَتِ اخْرُجْ عَلَيْهِنَّ ۖ فَلَمَّا رَأَيْنَهُ أَكْبَرْنَهُ وَقَطَّعْنَ أَيْدِيَهُنَّ وَقُلْنَ حَاشَ لِلَّهِ مَا هَٰذَا بَشَرًا إِنْ هَٰذَا إِلَّا مَلَكٌ كَرِيمٌ ﴿٣١﴾

मग जेव्हा त्यांची चकरमकर ऐकली, तेव्हा तिने त्यांना बोलवणे पाठवले;[७] आणि त्यांच्यासाठी एका सभेचे आयोजन[८] केले; आणि त्यांच्यातून प्रत्येकीला सुरी दिली. आणि म्हटले ये यूसुफ! यांच्या समोर तू बाहेर ये.[९] त्या स्त्रीयांनी जेव्हा त्याला पाहिले. तर त्याला फारच भव्य दिव्य जाणले, आणि हात कापून[१०] घेतले. आणि त्या म्हणू लागल्या हे अल्लाह! हा मनुष्य तर नक्कीच नाही, हा कोणी सन्माननीय देवदूत आहे.[११] (३१)

قَالَتْ فَذَٰلِكُنَّ الَّذِي لُمْتُنَّنِي فِيهِ ۖ وَلَقَدْ رَاوَدتُّهُ عَن نَّفْسِهِ فَاسْتَعْصَمَ ۖ وَلَئِن لَّمْ يَفْعَلْ مَا آمُرُهُ لَيُسْجَنَنَّ وَلَيَكُونًا مِّنَ الصَّاغِرِينَ ﴿٣٢﴾

त्यावेळी अजीजे मिस्रच्या पत्नीने म्हटले, हा तोच आहे, ज्याच्या बाबतीत तुम्ही मला दोषारोप करीत होता.[१२] आणि मी नेहमी त्याच्याशी आपले काम साधु इच्छिले, परंतु हा बालम् बाल वांचत राहिला. आणि जे काही मी त्यास सांगत आहे, जर हा करणार नाही, तर खचित्‌च हा तुरूंगात टाकला जाईल; आणि नि:संशय तो फारच क्षुल्लक होऊन जाईल.[१३] (३२)

१) ह.यूसुफ عليه السلام नी जेव्हा पाहिले की, ती स्त्री सर्व आरोप त्यांच्यावरच लावत आहे, तेव्हा वस्तुस्थिती स्पष्ट करून दिली; आणि म्हटले की मला वाईट कृत्याला भाग पाडण्याला हीच जबाबदार आहे. मी तिच्यापासून वांचण्यासाठी, बाहेर दरवाज्याकडे पळत आलो आहे.

२) हा त्याच कुटुंबातील कोणी समजदार माणूस होता, ज्याने हा फैसला केला. फैसल्याला येथे साक्षच्या शब्दाने संबोधण्यात आले. कारण प्रकरण सध्या चौकशीच्या अधीन होते. दूध पित्या मुलाच्या साक्षीची गोष्ट, विश्वासपूर्ण उल्लेखांनी सिद्ध नाही. सही ऐन मध्ये (म्हणजे बुखारी आणि मुस्लीममध्ये) तीन दूध पित्या मुलांची बोलण्याची हदीस आहे, ज्यात हा चौथा नाही; ज्याचा उल्लेख या ठिकाणी केला जातो.

३) हे अजीजे मिसरचे म्हणणे आहे. जे त्याने आपल्या पत्नीचे निंदनीय कृत्ये पाहून, स्त्रीयांच्या बाबतीत म्हटले. हे न अल्लाहचे म्हणणे आहे, आणि न प्रत्येक स्त्रीच्या बाबतीत, बरोबर म्हणून त्याला प्रत्येक स्त्रीला लागू करणे, आणि या आधारावर स्त्रीला धोका व फसवणूक करणारी ठरविणे, कुरआनाचा मुळीच उद्देश्य नाही. जसे की काही लोक, या वाक्याने स्त्रीच्या बाबतीत ही धारणा व्यक्त करतात.

४) म्हणजे याची चर्चा करू नका.
५) याच्याने ठाऊक होते की, 'अजीजे मिस्र' वर ह.यूसुफ عليه السلام चे निष्कलंक होणे स्पष्ट होऊन गेले होते.
६) ज्याप्रमाणे सुगंधाला परद्यांनी लपविले जाऊ शकत नाही; प्रेमाचा मामला पण असाच असतो. जरी अजीजे मिस्रने, ह.यूसुफ عليه السلام ला याला नजरेआड करण्याला सांगितले होते, आणि नक्कीच आपल्या शुभ मुखाने याचा उल्लेखपण झाला नसावा. असे असून सुद्धा, ही घटना जंगलांतल्या आगीप्रमाणे, पसरून गेली. आणि इजिप्तच्या स्त्रीयांमध्ये याची चर्चा सर्वदूर झाली. स्त्रीया आश्चर्य व्यक्त करू लागल्या की, प्रेम करावयाचेच होते, तर कोण्या रूप सौंदर्यावान माणसाशी करावयचे होते. हे काय? जुलैखा आपल्या दासावरच अनुरक्त होऊन गेली; ही तर तिची फारच नादानी आहे.
७) इजिप्तच्या स्त्रीयांच्या गुप्त गोष्टींना आणि टोमणे आणि निंदेला 'मकर' संबोधण्यात आले आहे. ज्यांचे कारण काही भाष्यकारांनी, असे वर्णन केले आहे की, या स्त्रीयांनासुद्धा ह.यूसुफ عليه السلام च्या अनुपम रूपसौंदर्याची, सूचना मिळून चुकली होती. म्हणून त्या, या अनुपम आणि अजोड रुपसौंदर्याला पाहू इच्छित होत्या. म्हणून त्या आपल्या या गुप्त खलबतांत यशस्वी होऊन गेल्यात आणि अजीजच्या पत्नीने, हे दाखविण्याकरीता की, मी ज्यावर अनुरक्त झाले आहे, केवळ एक दास किंवा एक सर्व साधारण माणूस नाही; किंबहुना उघड व गुप्त, अशा सौंदर्याने शृंगारीत आहे की, त्याला पाहून मनाचा तोल ढासळणे, काहीं न होण्यासारखी गोष्ट नाही. त्या स्त्रीयांच्या पाहुणचाराची व्यवस्था केली. आणि त्यांना जेवणाचे आमंत्रण दिले.
८) म्हणजे बसण्यासाठी अशा जागा बनविण्यात आल्या, ज्यांच्यात तक्के लावण्यात आले होते. जसे की आजकाल सुद्धा, अरबांमध्ये जमिनीवरील  अशा बसण्याच्या जागा सार्वत्रिक आहेत. येथपावेतो की हॉटेली आणि रेस्टॉरंटमध्ये सुद्धा यांची सोय आहे.
९) म्हणजे ह.यूसुफ عليه السلام ला पहिले लपवून ठेविले; जेव्हा सर्व स्त्रीयांनी हातात सुऱ्या धरल्या, तेव्हांअजीजच्या पत्नीने (जुलैखा) ह. यूसुफ عليه السلام ला बैठकीत हजर होण्याचा हुकूम दिला.
१०) म्हणजे ह. यूसुफ عليه السلام च्या सौंदर्याचे अप्रतिम रूप पाहून, एक तर त्यांच्या महत्तेला आणि भव्यदिव्य ज्ञानाला, शानला मान्य केले; आणि त्यांच्यावर अशी बेहोशी व धुंदीची अशी व्यवस्था झाली की, सुऱ्या आपल्याच हातावर चालवून घेतल्या ज्यामुळे त्यांचे हात जखमी आणि रक्ताने माखले गेले. हदीसमध्ये येते की, ह.यूसुफ عليه السلام ला अर्धे सौंदर्य देण्यात आले आहे. (स.मुस्लिम)
११) याचा हा अर्थ नाही की, देवदूत चेहरा मोहऱ्यात माणसापेक्षा उत्कृष्ट आणि श्रेष्ठ आहेत. कारण की देवदुतांना तर माणसांनी पाहिलेच नाही, याशिवाय माणसाच्या बाबतीत तर स्वत: अल्लाहतआलाने कुरआन करीममध्ये खुलासा केला आहे की, आम्ही त्याला चांगल्या रिते निटनिटके (उत्कृष्ट ढंग) निर्माण केले आहे. या स्त्रीयांनी, मनुष्य नसण्याचे केवळ यासाठी म्हटले की, त्यांनी रुप सौंदर्याचे एक असे स्वरूप पाहिले होते की,  जे मानवी चेहऱ्यात कधी त्यांच्या दृष्टीला पडले नव्हते. आणि त्यांनी देवदूत यासाठी म्हटले की, सर्वसाधारण मनुष्य, हेच समजतो की, देवदूत व्यक्ती आणि वैशिष्टयाच्या दृष्टीने, असे स्वरूप बाळगतात, जे मनुष्याच्या स्वरूपाच्या उच्चत्तम आहे. याने हे ठाऊक झाले की, पैगंबरांचे असामान्य वैशिष्ट्य आणि वेगळेपणाच्या आधारावर त्यांना मानवांतून काढून तेजस्वी निर्मिती (नुरानी मखलुक) ठरविणे, प्रत्येक काळाच्या अशा माणसांची रीत राहीली, जे पैगंबरी आणि त्याचे स्थान यापासून अनभिज्ञ असतात.
१२) जेव्हा अजीजच्या पत्नीने पाहिले की तिची चाल यशस्वी राहिली आहे, आणि स्त्रीया यूसुफच्या रूपसौंदर्याच्या तेजावर मदमस्त आणि धुंद होऊन गेल्यांत, तेव्हा म्हणू लागली, त्याच्या एका झलकीने, तुमची ही स्थिती झाली आहे, तर काय तुम्ही आतासुद्धा, मला त्याच्या प्रेमांत पडण्याबद्दल, टोमणे माराल? हाच तो दास आहे, ज्याच्या बाबतीत तुम्ही माझी निंदा करीत आहात.
१३) स्त्रीयांची ही बेहोशी पाहून तिला आणखी हिंमत झाली, आणि शालिनता, लज्जेचे सर्व परदे दूर सारून, तिने आपल्या वाईट इराद्यांचा पुन्हा एकदा पुनरुच्चार केला.

قَالَ رَبِّ السِّجْنُ اَحَبُّ اِلَيَّ مِمَّا يَدْعُوْنَنِيْٓ اِلَيْهِ ۚ وَاِلَّا تَصْرِفْ عَنِّيْ كَيْدَهُنَّ اَصْبُ اِلَيْهِنَّ وَاَكُنْ مِّنَ الْجٰهِلِيْنَ ﴿٣٣﴾

**यूसुफने प्रार्थना केली की, हे माझ्या पालनकर्त्या! ज्या गोष्टीकडे या स्त्रीया मला बोलावित आहेत, यापेक्षातर तुरूंग मला जास्त पसंत आहे. जर तू त्यांच्या कावेबाजीला माझ्यापासून दूर न केलेस तर मी त्यांच्याकडे झुकेन, आणि फारच अज्ञानीमधून होऊन जाईन.[१]** (३३)

فَاسْتَجَابَ لَهٗ رَبُّهٗ فَصَرَفَ عَنْهُ كَيْدَهُنَّ ۭ اِنَّهٗ هُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٣٤﴾

**त्याच्या पालनकर्त्याने त्याची प्रार्थना मान्य केली. आणि त्या स्त्रीयांचे डावपेंच त्याच्यापासून फिरवून टाकले. खचित्च तो ऐकणारा आणि जाणणारा आहे.** (३४)

ع ٤/١٤

ثُمَّ بَدَا لَهُمْ مِّنْۢ بَعْدِ مَا رَاَوُا الْاٰيٰتِ لَيَسْجُنُنَّهٗ حَتّٰى حِيْنٍ ﴿٣٥﴾

४/६/१४

**मग त्या सर्व निशाण्यांना पाहून घेतल्यावर सुद्धा, त्यांना हेच योग्य वाटले की, यूसुफला काही मुदतीसाठी तुरूंगात ठेवावे.[२]** (३५)

وَدَخَلَ مَعَهُ السِّجْنَ فَتَيٰنِ ۭ قَالَ اَحَدُهُمَآ اِنِّىْٓ اَرٰىنِيْٓ اَعْصِرُ خَمْرًا ۚ وَقَالَ الْاٰخَرُ اِنِّىْٓ اَرٰىنِيْٓ اَحْمِلُ فَوْقَ رَاْسِيْ خُبْزًا تَاْكُلُ الطَّيْرُ مِنْهُ ۭ نَبِّئْنَا بِتَاْوِيْلِهٖ ۚ اِنَّا نَرٰىكَ مِنَ الْمُحْسِنِيْنَ ﴿٣٦﴾

**त्याच्याबरोबर आणखी दोन तरूण सुद्धा, तुरूंगात दाखल झाले; त्यांच्यातून एकाने म्हटले, मी स्वप्नांत, आपल्या स्वत:ला, मद्य बनवितांना पाहिले आहे; आणि दुसऱ्याने म्हटले की, मी स्वत:ला पाहिले की, आपल्या डोक्यावर भाकरी उचलून आहे, ज्यांना पांखरे खात आहेत. आम्हास आपण याचे भाकीत सांगावे; आम्हांस तर आपण परोपकारी माणूस दिसत आहांत[३]** (३६)

قَالَ لَا يَاْتِيْكُمَا طَعَامٌ تُرْزَقٰنِهٖٓ اِلَّا نَبَّاْتُكُمَا بِتَاْوِيْلِهٖ قَبْلَ اَنْ يَّاْتِيَكُمَا ۭ ذٰلِكُمَا مِمَّا عَلَّمَنِيْ رَبِّيْ ۭ اِنِّىْ تَرَكْتُ مِلَّةَ قَوْمٍ لَّا يُؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَهُمْ بِالْاٰخِرَةِ هُمْ كٰفِرُوْنَ ﴿٣٧﴾

**यूसुफांनी म्हटले, तुम्हास जे जेवण दिले जाते, त्याचे तुमच्याजवळ पोहचण्यापूर्वीच, मी तुम्हास याचे भाकीत सांगून देईन; हे सर्व त्या ज्ञानामुळे आहे, जे मला माझ्या पालनकर्त्याने शिकविले आहे.[४] मी त्या लोकांचा धर्म सोडून दिला आहे, जे अल्लाहवर ईमान बाळगत नाहीत; आणि परलोकाला पण नाकारणारे आहेत.[५]** (३७)

१) ह.यूसुफ عليه السلام नी ही प्रार्थना आपल्या मनात केली. यासाठी की, एका ईमानवाल्यासाठी दुआपण एक शस्त्र आहे. हदीसमध्ये येते सात माणसांना अल्लाहतआला, कयामतच्या दिवशी, अर्षची सांवली देईन. त्यांच्यातून एक तो मनुष्य आहे, ज्याला एक अशी स्त्री पापाचे आमंत्रण देईल, जी रूप सौंदर्याने पण सुशोभित असावी आणि मानमर्तबावाली आणि पदाधिकारीपण असावी. परंतु तो, त्याच्या उत्तरांत हे सांगून टाकेल की मी तर ''अल्लाहला भितो'' (स. बुखारी व स. मुस्लिम)

२) शिलसंपन्न आणि निष्कलंकता, स्पष्ट होऊन गेल्यावर सुद्धां, ह.यूसुफ عليه السلام ला तुरूंगात टाकण्याला, हेच कारण त्यांच्या डोळ्यासमोर असू शकते की, अजीजे मिस्र यूसुफला आपल्या पत्नीपासून दूर ठेवू इच्छित असेल; कारण की तिने पुन्हा दुसऱ्यादा, त्याला आपल्या जाळ्यात फसविण्याचा प्रयत्न करू नये. जसे की तसा इरादा बाळगीत होती.

३) हे दोघे तरूण राजाच्या दरबाराशी संबंधीत होते. एक दारू पाजण्यावर तैनात होता, आणि दुसरा स्वयंपाकी (भाकरी भाजणारा) होता. कोण्या कृत्यावर दोघांना गजाआड करून देण्यात आले होते. ह.यूसुफ عليه السلام, अल्लाहचे पैगंबर होते. आवाहन आणि प्रचाराबरोबर, उपासना व जप, ईशभय आणि सत्त्यवाद आणि चारित्र्य आणि कृतीच्या दृष्टीकोनांतून, तुरूंगात दुसऱ्या तमाम कैद्यांपेक्षा वेगळे होते. याशिवाय, स्वप्नांच्या भाकीताचे विशेष ज्ञान, आणि योग्यता, अल्लाहने त्यांना दिली होती. या दोघांनी स्वप्न पाहिले, तेव्हा नैसर्गिकरित्या, ह.यूसुफ عليه السلام ला त्यांनी ते सांगितले. आणि म्हटले, आम्हांस तुम्ही सदाचरणी लोकांमधून दिसतात. आम्हास आमच्या स्वप्नांचे भाकीत सांगावे. मुहसीनचा अर्थ काहींनी हा पण केला की, आपण स्वप्नांचे भाकीत चांगले वर्तवितात.

४) म्हणजे मी जे भाकीत सांगेन, ते जिन्नांकडून माहित करून घेऊन सांगणारा आणि ज्योतिषांप्रमाणे गुमान आणि अंदाजावर आधारीत नसेल, ज्यांत चूक आणि बरोबर, दोघांची शक्यता असते. किंबहुना माझे भाकीत निश्चित ज्ञानावर आधारित असेल, जे अल्लाहकडून मला देण्यात आले आहे, ज्यात चूक होण्याचा संभवच नाही.

५) हे अल्लाहकडून मनांत टाकले गेलेले आणि अल्लाहकडून देण्यात आलेले ज्ञान (जे आपणास देण्यात आले होते.) चे कारण सांगण्यात येत आहे की, मी त्या लोकांचा धर्म सोडून दिला, जे अल्लाह आणि परलोकावर विश्वास ठेवत नाही; याच्या बदल्यांत अल्लाहतआलाचे हे बक्षीस मला मिळाले.

وَاتَّبَعْتُ مِلَّةَ اٰبَآءِيْٓ اِبْرٰهِيْمَ وَاِسْحٰقَ وَيَعْقُوْبَ ۭ مَا كَانَ لَنَآ اَنْ نُّشْرِكَ بِاللّٰهِ مِنْ شَيْءٍ ۭ ذٰلِكَ مِنْ فَضْلِ اللّٰهِ عَلَيْنَا وَعَلَى النَّاسِ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا يَشْكُرُوْنَ ۝٣٨

मी आपल्या वाडवडीलांच्या धर्मावर चालत राहिलो आहे; म्हणजे इब्राहीम व इस्हाक आणि याकूबच्या धर्मावर;[१] आम्हास हे मुळीच योग्य नाही की, आम्ही अल्लाहतआला बरोबर कोणास पण सहभागी करावे.[२] आम्हांवर आणि सर्व लोकांवर, अल्लाहतआलाची ही विशेष कृपा आहे; परंतु बहुतेक लोक कृत्घ्नता करतात ३८

يٰصَاحِبَيِ السِّجْنِ ءَاَرْبَابٌ مُّتَفَرِّقُوْنَ خَيْرٌ اَمِ اللّٰهُ الْوَاحِدُ الْقَهَّارُ ۝٣٩

हे माझ्या तुरूंगातील साथीदारांनो, [३] काय वेगवेगळे कित्येक अल्लाह योग्य आहेत किंवा एक जबरदस्त शक्तीमान अल्लाह? [४] ३९

مَا تَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِهٖٓ اِلَّآ اَسْمَاۗءً سَمَّيْتُمُوْهَآ اَنْتُمْ وَاٰبَاۗؤُكُمْ مَّآ اَنْزَلَ اللّٰهُ بِهَا مِنْ سُلْطٰنٍ ۭ اِنِ الْحُكْمُ اِلَّا لِلّٰهِ ۭ اَمَرَ اَلَّا تَعْبُدُوْٓا اِلَّآ اِيَّاهُ ۭ ذٰلِكَ الدِّيْنُ الْقَيِّمُ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُوْنَ ۝٤٠

त्याच्याशिवाय तुम्ही ज्याची पुजा अर्चा करीत आहात, ते फक्त नांवच नांव आहेत; जे तुम्ही आणि तुमच्या वाडवडीलांनी स्वत:च रचून ठेवले आहेत; अल्लाहतआलाने त्यांच्यासाठी कोणी सनद अवतरीत केली नाही.[५] हुकूम सादर करणे, फक्त अल्लाहतआला करिताच आहे. त्याचा हुकूम आहे की, तुम्ही सर्व त्याच्याशिवाय, दुसऱ्या कोणाची उपासना करू नका. हाच सरळ धर्म [६] आहे; परंतु बहुतेक लोक जाणत नाही[७] ४०

يٰصَاحِبَيِ السِّجْنِ اَمَّآ اَحَدُكُمَا فَيَسْقِيْ رَبَّهٗ خَمْرًا ۚ وَاَمَّا الْاٰخَرُ فَيُصْلَبُ فَتَاْكُلُ الطَّيْرُ مِنْ رَّاْسِهٖ ۭ قُضِيَ الْاَمْرُ الَّذِيْ فِيْهِ تَسْتَفْتِيٰنِ ۝٤١

हे माझ्या बंदिशाळेतील मित्रांनो![८] तुम्हा दोघांमधून एक तर आपल्या बादशाहला मद्य पाजण्यावर (पुन्हा) निश्चित होऊन जाईल;[९] परंतु दुसरा फांसावर चढविला जाईल; आणि पक्षी त्याचे डोके तोडून तोडून खातील.[१०] तुम्ही दोहो ज्या बाबतीत चौकशी करीत होते, त्या कामाचा निर्णय करून टाकण्यांत आला आहे.[११] ४१

وَقَالَ لِلَّذِيْ ظَنَّ اَنَّهٗ نَاجٍ مِّنْهُمَا اذْكُرْنِيْ عِنْدَ رَبِّكَ ۡ فَاَنْسٰىهُ الشَّيْطٰنُ ذِكْرَ رَبِّهٖ فَلَبِثَ فِي السِّجْنِ بِضْعَ سِنِيْنَ ۝٤٢

आणि ज्याच्या बाबतीत यूसुफचा अंदाज होता की, या दोघांतून तो सुटून जाईन, त्याला म्हटले, आपल्या बादशाहजवळ माझा उल्लेख पण करून द्यावा; मग त्याला शैतानाने, आपल्या बादशाहजवळ उल्लेख करणे, विसरून दिले. आणि यूसुफने कित्येक वर्ष तुरूंगातच घालविली.[१२] ४२

وَقَالَ الْمَلِكُ اِنِّىْٓ اَرٰى سَبْعَ بَقَرٰتٍ سِمَانٍ يَّاْكُلُهُنَّ سَبْعٌ عِجَافٌ وَّسَبْعَ سُنْۢبُلٰتٍ خُضْرٍ وَّاُخَرَ يٰبِسٰتٍ ۭ يٰٓاَيُّهَا الْمَلَاُ اَفْتُوْنِيْ فِيْ رُءْيَايَ اِنْ كُنْتُمْ لِلرُّءْيَا تَعْبُرُوْنَ ۝٤٣

आणि बादशाहने म्हटले, मी स्वप्नांत पाहिले, सात लठ्ठ आणि गुबगुबीत गाई आहेत, ज्यांना सात अशक्त आणि रोडक्या गाई, खात आहेत. आणि सात कणसे आहेत, हिरवी आणि टवटवीत, आणि सात आणखी सुकलेली. हे माझ्या दरबार मंडळींनो! माझ्या या स्वप्नांचे भाकीत सांगा, जर तुम्ही स्वप्नांचे भाकीत सांगू शकत असाल ४३

قَالُوْٓا اَضْغَاثُ اَحْلَامٍ ۚ وَمَا نَحْنُ بِتَاْوِيْلِ الْاَحْلَامِ بِعٰلِمِيْنَ ۝٤٤

त्यांनी उत्तर दिले की, ही काही गोंधळलेलीशी स्वप्ने आहेत. आणि अशा स्वप्नांचे भाकीत सांगणे आम्ही जाणत नाही [१३] ४४

وَقَالَ الَّذِيْ نَجَا مِنْهُمَا وَادَّكَرَ بَعْدَ اُمَّةٍ اَنَا اُنَبِّئُكُمْ بِتَاْوِيْلِهٖ فَاَرْسِلُوْنِ ۝٤٥

त्या कैद्यांमधून जो सुटला होता; त्याला आता मुदतीनंतर आठवण आली, आणि म्हणू लागला, मी तुम्हास याचे भाकीत सांगून देईन, मला जाण्याची परवानगी द्यावी [१४] ४५

१) 'अज्दाद' ला सुद्धा वाडवडील म्हटले, कारण ते सुद्धा वडील आहेत. मग क्रमांत सुद्धा मोठे वडील (इब्राहीम) मग जवळचे वडील (इस्हाक) मग पिता (याकूब) चा उल्लेख केला. म्हणजे पहिले, पहिले मुळ, मग दुसरे मूळ, मग तिसरे मूळ, वर्णन केले.

२) हे तेच एकेश्वरवादाचे आमंत्रण आणि 'शिर्क' चे खंडन आहे. जे प्रत्येक पैगंबराचे आधारभूत आणि पहिले शिक्षण आणि आमंत्रण असे.

३) कैदेतील साथीदार, यासाठी म्हटले की हे सर्व, एका काळापासून, तुरूंगात वास्तव्य करून होते.

४) हा फरक जाती, वैशिष्टये आणि संख्येच्या दृष्टीकोनांतून आहे. म्हणजे तो पालनकर्ता, जो जातीच्या अनुषंगाने, एक दुसऱ्यापासून वेगळा, वैशिष्ट्याच्या मध्ये एका दुसऱ्यापासून निराळा, तो उत्कृष्ट आहे, का तो अल्लाह जो आपल्या जाती वैशिष्ट्यात, एकटा आहे ज्याचा कोणी सरकतदार नाही. आणि तो सर्वांवर वरचढ आणि सत्ताधीश आहे? (फत्हुल कदीर)

५) याचा एक अर्थ तर हा आहे की, त्यांचे नाव, उपास्य, तुम्ही स्वत:च ठेवून घेतले आहे. वास्तविक पहाता ते उपास्य नाहीत, तसेच त्यांच्या बाबतीत कोणी प्रमाण अल्लाहने उतारले आहे. दुसरा अर्थ हा आहे की, या उपास्यांची जी निरनिराळी नांवे तुम्ही योजून ठेवली आहेत, उदाहरणार्थ, ख्वाजा गरीब नवाज, गंज बख्श, शकरगंज, करनीवाला, करमाल वाला, वगैरे हे सर्व तुमचे स्वत:चे रचलेले आहेत; त्यांचे काही प्रमाण अल्लाहने उतारले नाही.

६) हाच धर्म, ज्याचेकडे मी तुम्हास बोलवत आहे, ज्यात फक्त एका अल्लाहची उपासना आहे, योग्य आणि नित्य राहणारा आहे; ज्याचा हुकूम अल्लाहने दिला आहे.

७) ज्याच्या निमित्ताने बहुतेक लोक शिर्क करतात, ''अल्लाहवर ईमान बाळगणाऱ्यांची बहुतायतता शिर्क करणाऱ्यांची आहे.'' (सू. यूसुफ - १०६) आणि फर्माविले, ''हे पैगंबरा! तुझी इच्छा असून सुद्धा, बहुतेक लोक, अल्लाहवर ईमान आणणारे नाहीत'' (सू. यूसुफ - १०३)

८) एकेश्वरवादाचा उपदेश केल्यानंतर, ह.यूसुफ عليه السلام, त्यांनी सांगितलेल्या, स्वप्नांचे भाकीत सांगत आहेत.

९) हा तो मनुष्य आहे, ज्याने स्वप्नांत, आपल्याला द्राक्षांची दारू तयार करतांना पाहिले होते. तथापि आपण (ह.यूसुफ عليه السلام) दोघांमधून कोणाही एकाला निश्चित केले नाही की, मरणारा पहिलेच दु:खांत व्यस्त होऊन न जावा.

१०) हा तो मनुष्य आहे, ज्याने स्वप्नांत, आपल्या डोक्यावर, भाकरी उचललेल्या पाहिल्या होत्या.

११) म्हणजे अल्लाहकडून, प्रारब्धात, पूर्वीपासून ही गोष्ट निश्चित आहे; आणि जे भाकीत मी सांगितले आहे, नक्कीच होऊन राहील. जसे की हदीसमध्ये आहे, रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, की,''स्वप्न, जोपर्यंत त्याचे भाकीत न सांगण्यात येईल, पक्ष्यांच्या पायांवर आहे. जेव्हा त्याचे भाकीत सांगून देण्यांत येईल, तर ते घडून येते.'' (मुसनद अहमद, इब्ने कसीर) काही लोक म्हणतात की, जेव्हा ह. यूसुफ عليه السلام नी चर्चित भाकीते सांगितली, तर ते दोघे म्हणू लागले की, आम्ही तर कोणी स्वप्न पाहिले नव्हते. आम्ही तर तसेच, आपल्याकडून रचून, हे स्वप्न सांगितले होते. ज्यावर ह.यूसुफ عليه السلام नी सांगितले तर आता घडूनच राहील.

१२) 'बिजअ' चा श ब्द, तीनपासून नऊपर्यंताच्या संख्येसाठी म्हटला जातो. वहब बिन मुनब्बाचे म्हणणे आहे, ह.अय्यूब عليه السلام परीक्षेत, आणि ह.यूसुफ عليه السلام कैदेत सात वर्षे राहिले. आणखी बुख्त नसरची शिक्षापण सात वर्षे राहिली. आणि काहींच्या मते, बारा वर्षे आणि काहींच्या मते चौदा वर्षे, तुरूंगात राहिले, वल्लाह् अअ्लम!

१३) 'अजगास' 'जिगसून' चे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ गवताचे गट्ठे आहेत. अहलाम, हिल्म (म्हणजे स्वप्न) चे अनेकवचन आहे. अजगास अहलामचा अर्थ होईल, परेशान करणारी स्वप्ने किंवा वैचारीक गोंधळ, ज्याचे काही भाकीत नाही. हे स्वप्न त्या बादशाहला पडले, अजीजे मिस्त्र, ज्याचा मंत्री होता. अल्लाहतआलाला या स्वप्नामार्फत, यूसुफ عليه السلام ची सुटका अंमलात आणावयाची होती. जसे की, बादशाहाच्या दरबारी मंडळींनी, काहीनांनी आणि ज्योतिष्यांनी या विचित्र स्वप्नांचे भाकीत सांगण्याला असमर्थता जाहीर केली. काही म्हणतात की, ज्योतिष्यांच्या या म्हणण्याचा अर्थ एकदमच भाकीताचे ज्ञान नसणे आहे. आणि काही म्हणतात की, भाकीताचे ज्ञान त्यांना नव्हते असे नाही, तसेच त्यांनी या ज्ञान नसण्याला म्हटले, त्यांनी फक्त या स्वप्नाचे भाकीत वर्तविण्याला, अज्ञान जाहीर केले.

१४) हा तुरूंगातील, दोन साथीदारांपैकी एक, सुटका झालेला होता. ज्याला ह.यूसुफ عليه السلام नी सांगितले होते की, आपल्या धन्याकडे माझा उल्लेख करावा. कारण की माझी पण येथून सुटका व्हावी. त्याला अचानक आठवण झाली, आणि त्याने सांगितले की मला अवकाश द्या; मी तुम्हास येऊन, त्याचे भाकीत सांगतो. म्हणून तो सरळ निघून यूसुफजवळ येऊन पोहोचला. आणि स्वप्नाचा तपशिल सांगून, त्याच्या भाकीताबद्दल विचारले. 'फ अर्सिलून' (तुम्ही मला पाठवां), जमाचा सेगा बादशाह करीता, सन्मान म्हणून उपयोगात आणला, किंवा बादशाहबरोबर, दरबारांत उपस्थित असलेल्यांना, संबोधित करून, ह.यूसुफ عليه السلام जवळ जाण्याची परवानगी मागितली.

يُوسُفُ أَيُّهَا الصِّدِّيقُ أَفْتِنَا فِي سَبْعِ بَقَرَاتٍ سِمَانٍ
يَأْكُلُهُنَّ سَبْعٌ عِجَافٌ وَسَبْعِ سُنْبُلَاتٍ خُضْرٍ
وَأُخَرَ يَابِسَاتٍ لَّعَلِّي أَرْجِعُ إِلَى النَّاسِ لَعَلَّهُمْ يَعْلَمُونَ ﴿٤٦﴾

हे यूसुफ! हे फार मोठे सत्य सांगणाऱ्या यूसुफ! आपण आम्हास या स्वप्नांचे भाकीत सांगावे की सात मोठ्या लठ्ठ गुबगुबीत गाई आहेत, ज्यांना सात रोडक्या गाई खात आहेत. आणि सात एकदम हिरवीगार कणसे आहेत. आणि सातच आणखी सुद्धा, एकदम वाळलेली आहेत. कारण की मी परत जाऊन, त्या लोकांना सांगून द्यावे की, त्यांनी सर्व माहित करून घ्यावे (४६)

قَالَ تَزْرَعُونَ سَبْعَ سِنِينَ دَأَبًا فَمَا حَصَدتُّمْ فَذَرُوهُ
فِي سُنبُلِهِ إِلَّا قَلِيلًا مِّمَّا تَأْكُلُونَ ﴿٤٧﴾

यूसुफने उत्तर दिले की, तुम्ही सात वर्षापर्यंत नेहमी प्रमाणे, सतत, संवयीनुसार धान्य पेरीत रहावे. आणि पीक कापून, ते कणसांतच राहू द्यावे. परंतु थोडेसे, जे तुम्ही खाण्याच्या कामी घ्याल (४७)

ثُمَّ يَأْتِي مِن بَعْدِ ذَٰلِكَ سَبْعٌ شِدَادٌ يَأْكُلْنَ
مَا قَدَّمْتُمْ لَهُنَّ إِلَّا قَلِيلًا مِّمَّا تُحْصِنُونَ ﴿٤٨﴾

याच्यानंतर सात वर्षे फारच भिषण दुष्काळाचे दिवस येतील, आणि ते या धान्याला खाऊन टाकतील, जे तुम्ही यांच्याकरीता साठवण म्हणून सोडले होते. [१] परंतु थोडेसे जे तुम्ही राखून ठेवाल. [२] (४८)

६
७
१६

ثُمَّ يَأْتِي مِن بَعْدِ ذَٰلِكَ عَامٌ فِيهِ يُغَاثُ النَّاسُ
وَفِيهِ يَعْصِرُونَ ﴿٤٩﴾

याच्यानंतर जे वर्षे येईल, त्यांत लोकांवर खूप पाऊस वर्षविण्यात येईल; आणि त्यांत (द्राक्षाची) दारूपण खूप पिळतील. [३] (४९)

وَقَالَ الْمَلِكُ ائْتُونِي بِهِ ۖ فَلَمَّا جَاءَهُ الرَّسُولُ قَالَ
ارْجِعْ إِلَىٰ رَبِّكَ فَاسْأَلْهُ مَا بَالُ النِّسْوَةِ اللَّاتِي قَطَّعْنَ
أَيْدِيَهُنَّ ۚ إِنَّ رَبِّي بِكَيْدِهِنَّ عَلِيمٌ ﴿٥٠﴾

बादशाहने म्हटले, यूसुफला माझेजवळ घेऊन या! [४] जेव्हा निरोप घेऊन जाणारा यूसुफजवळ पोहचला, तेव्हा त्यांनी म्हटले आपल्या बादशाहजवळ परत जा, आणि त्याला विचार की, त्या स्त्रीयांची खरी हकीकत काय आहे, ज्यांनी आपले हात कापून घेतले होते? [५] त्यांच्या काव्याला,( खऱ्याप्रकारे) माझा पालनकर्ताच जाणतो (५०)

قَالَ مَا خَطْبُكُنَّ إِذْ رَاوَدتُّنَّ يُوسُفَ عَن نَّفْسِهِ ۚ
قُلْنَ حَاشَ لِلَّهِ مَا عَلِمْنَا عَلَيْهِ مِن سُوءٍ ۚ قَالَتِ امْرَأَتُ
الْعَزِيزِ الْآنَ حَصْحَصَ الْحَقُّ أَنَا رَاوَدتُّهُ عَن نَّفْسِهِ
وَإِنَّهُ لَمِنَ الصَّادِقِينَ ﴿٥١﴾

बादशाहने विचारले, हे स्त्रीयांनो! त्या वेळची खरी गोष्ट काय आहे, जेव्हा तुम्ही डांवपेच लढवून, यूसुफला त्याच्या मनाच्या इच्छेपासून बहकवू इच्छित होता? त्यांनी साफ उत्तर दिले अल्लाहची पनाह आहे! आम्ही यूसुफमध्ये काहीच वाईट पावलो नाही. [६] मग तर अजीजची पत्नी पण बोलू लागली की, आतातर सत्य गोष्ट जाहीर होऊन चुकली. मीच त्याला फुसलावले होते; त्याच्या मनाकडून आणि खचित्‌च तो खऱ्यांपैकी आहे. [७] (५१)

ذَٰلِكَ لِيَعْلَمَ أَنِّي لَمْ أَخُنْهُ بِالْغَيْبِ وَأَنَّ اللَّهَ لَا يَهْدِي
كَيْدَ الْخَائِنِينَ ﴿٥٢﴾

(यूसुफने म्हटले) हे यासाठी की, (अजीजने) जाणून घ्यावे की, मी त्याच्या पाठीमागे त्याचा विश्वास घात केला नाही. [८] आणि हे पण की, अल्लाह विश्वासघात करणाऱ्यांचे डावपेंच चालू देत नसतो [९] (५२)

१) ह.यूसुफ عليه السلام ला अल्लाहतआलाने स्वप्नांचे भाकीत करण्याचे पण ज्ञान दिले होते. म्हणून ते या स्वप्नांच्या तळापर्यंत ताबडतोब पोहचूंन गेले. त्यांनी मोठ्या लठ्ठ गुबगुबीत गाईंनी, असे सात वर्षे गृहीत धरले, ज्यांत खूप उपज होईल. आणि सात रोडक्या गाईंनी, याच्या विरूद्ध सात वर्षे दुष्काळाची; अशाचप्रकारे सात हिरव्यागार कणसांनी अभिप्रेत धरले की, जमीन फारच उपज देईल. आणि सात वाळलेल्या कणसांचा अर्थ हा आहे की, या सात वर्षांत जमिनींत काही पिकणार नाही. आणि मग याच्यासाठी युक्ती पण सांगितली की, सात वर्षे तुम्ही लगातार शेती करा. आणि जे धान्य निर्माण होईल, त्याला कापून, कणसांमध्ये सांभाळून ठेवा. कारण की त्यात धान्य सुरक्षित रहावे. मग जेव्हा सात वर्षे दुष्काळाची येतील, तर हे धान्य तुमच्या कामी येईल, ज्याचा साठा तुम्ही आता कराल.

२) मिम्मा 'तुह्‌सिनून' ने अभिप्रेत ते धान्य आहे, जे दुसऱ्यांदा पेरण्यासाठी संरक्षित केले जाते.

३) म्हणजे दुष्काळाची सात वर्षे उलटून गेल्यानंतर, मग खूप पाऊस पडेल, ज्याचे परिणाम खूप उत्पन्न येईल. आणि

तुम्ही द्राक्षांपासून त्याचा रस पिळाल. जैतून पासून त्याचे तेल काढाल, आणि जनावरांपासून दूध काढाल. स्वप्नाच्या या भाकीताला, स्वप्नाशी कसे सुक्ष्म साधर्म्य प्राप्त आहे, त्याला फक्त तोच मनुष्य समजू शकतो, ज्याला अल्लाहतआला योग्य समझ, चांगली रोजी, आणि चांगली व योग्य लायकी प्रदान करेल; जे अल्लाहतआलाने ह.यूसुफ عليه السلام ला प्रदान केले होते.

४) अर्थ हा आहे की जेव्हा तो मनुष्य स्वप्नांचे भाकीत समजून घेऊन, बादशाह जवळ गेला, आणि त्याला भाकीत सांगितले, तर तो या भाकीताने, आणि ह.यूसुफ عليه السلام च्या दाखविलेल्या युक्तीने फारच प्रभावित झाला; आणि त्याने हा अंदाज करून घेतला की, हा मनुष्य, ज्याला बऱ्याच काळापासून गजाआड केले आहे; उत्कृष्ट ज्ञान, आणि तत्वदर्शिता, आणि उच्चप्रकारची योग्यता, याच्याने परिपूर्ण आहे.

५) ह.यूसुफ عليه السلام नी जेव्हा पाहिले की, बादशाह आता कृपा करण्यास तयार आहे, तेव्हा त्यांनी अशाप्रकारे निव्वळ बादशाहच्या कृपेने तुरूंगातून बाहेर पडण्याला पंसत केले नाही. किंबहुना आपल्या कर्तृत्वाची उंची आणि निष्कलंकताच्या सिद्ध होण्याला प्राधान्य दिले; यासाठी की, जगाच्या पुढे आपल्या कर्तृत्वाचे भलेपण आणि त्याची महत्ता स्पष्ट होऊन जावी. कारण की अल्लाहच्या आवाहकाला शुद्ध चारित्र्य, शीलसंपन्नता, निष्कलंकता, आणि कर्तृत्वाची उंची, फार आवश्यक आहे.

६) बादशाहच्या चौकशीने, सर्व स्त्रीयांनी ह.यूसुफ عليه السلام च्या निष्कलंकतेला मान्य केले.

७) आतांअजीजच्या पत्नीला (जुलैखा) पण, हे मान्य केल्याशिवाय काही मार्ग राहिला नाही की, ह.यूसुफ عليه السلام निर्दोष आहेत. आणि यात पुढाकार माझ्याच कडून घेण्यात आला होता. या भल्या माणसाचा, या चिखलफेकीशी काही संबंध नाही.

८) जेव्हा तुरूंगांत, ह.यूसुफ عليه السلام ला हा सर्व तपशील सांगण्यात आला, तर त्याला ऐकून ह.यूसुफ عليه السلام नी हे म्हटले, आणि काही म्हणतात की, बादशाह जवळ जाऊन त्यांनी हे म्हटले, आणि काही भाष्यकाराजवळ, हे पण जुलैखाचे म्हणणे आहे. आणि अर्थ हा आहे की, ह.यूसुफ عليه السلام च्या अनुपस्थितीत सुद्धां, त्याचेवर चुकीच्या पद्धतीने आळ घेऊन, विश्वासघाताचा आरोप करीत नाही, किंबहुना, विश्वसनीयतेच्या मागणींना पुढे ठेवून, आपल्या चुकीला मान्य करते. किंवा हा अर्थ आहे की मी आपल्या पतीचा विश्वासघात केला नाही. आणि कोण्या मोठ्या भीतीदायक घटनेत पण व्यस्त झाली नाही. इमाम कसीरने या म्हणण्याला पुष्टी दिली आहे.

९) की, त्या नेहमी आपल्या चालबाजीत यशस्वी रहाव्यात. परंतु त्यांचा परिणाम मर्यादित आणि तात्कालीक असतो. सरशेवटी, विजय सत्त्याचा आणि सत्यवादींचाच होत असतो. जरी तात्कालीकरीत्या सत्यवादींना, परीक्षेतून पार व्हावे लागेल.

وَمَآ أُبَرِّئُ نَفۡسِيٓۚ إِنَّ ٱلنَّفۡسَ لَأَمَّارَةُۢ بِٱلسُّوٓءِ إِلَّا مَا رَحِمَ رَبِّيٓۚ إِنَّ رَبِّي غَفُورٞ رَّحِيمٞ ﴿٥٣﴾

आणि मी आपल्या मनाचे पावित्र्य सांगत नाही[१]. नि:संशय जीव, तर दुष्ट वासनांना प्रवृत्त करीतच असतो[२]; परंतु हे की माझा पालनकर्ताच आपली दया करील[३]; खचित्‌च माझा पालनकर्ता मोठा क्षमकर्ता आणि दयाळू आहे. (५३)

وَقَالَ ٱلۡمَلِكُ ٱئۡتُونِي بِهِۦٓ أَسۡتَخۡلِصۡهُ لِنَفۡسِيۖ فَلَمَّا كَلَّمَهُۥ قَالَ إِنَّكَ ٱلۡيَوۡمَ لَدَيۡنَا مَكِينٌ أَمِينٞ ﴿٥٤﴾

आणि बादशहाने म्हटले त्याला माझ्या जवळ घेऊन या की, मी त्याला आपल्या खास वैयक्तिक कामांसाठी निश्चित करून घ्यावे[४]; मग जेव्हा त्याचेशी संभाषण केले, तेव्हा म्हणू लागला की, तुम्ही आमच्याजवळ सन्माननीय आणि विश्वसनीय आहात[५]. (५४)

قَالَ ٱجۡعَلۡنِي عَلَىٰ خَزَآئِنِ ٱلۡأَرۡضِۖ إِنِّي حَفِيظٌ عَلِيمٞ ﴿٥٥﴾

(यूसुफने) म्हटले, आपण मला राज्याच्या खजीन्यावर नेमून टाकावे[६]. मी संरक्षणकर्ता आणि वाकबगार आहे[७]. (५५)

وَكَذَٰلِكَ مَكَّنَّا لِيُوسُفَ فِي ٱلۡأَرۡضِ يَتَبَوَّأُ مِنۡهَا حَيۡثُ يَشَآءُۚ نُصِيبُ بِرَحۡمَتِنَا مَن نَّشَآءُۖ وَلَا نُضِيعُ أَجۡرَ ٱلۡمُحۡسِنِينَ ﴿٥٦﴾

आणि अशाप्रकारे आम्ही यूसुफला राज्याचा कब्जा देऊन टाकला, की त्याने जेथे कोठे इच्छावे(तेथे) जावे, रहावे[८]. आम्ही ज्यांच्यावर इच्छितो त्यांच्यावर आपली दया करतो; आम्ही सुकृत्य करणाऱ्यांचे प्रतिफळ वाया जाऊ देत नसतो[९]. (५६)

وَلَأَجۡرُ ٱلۡأٓخِرَةِ خَيۡرٞ لِّلَّذِينَ ءَامَنُواْ وَكَانُواْ يَتَّقُونَ ﴿٥٧﴾

आणि खचितच ईमानवाल्यांचे आणि अल्लाहला भिणाऱ्यांचे, पारलौकिक, प्रतिफल, फारच उत्तम आहे. (५७)

وَجَآءَ إِخۡوَةُ يُوسُفَ فَدَخَلُواْ عَلَيۡهِ فَعَرَفَهُمۡ وَهُمۡ لَهُۥ مُنكِرُونَ ﴿٥٨﴾

आणि यूसुफ(अ.) चे भाऊ आले आणि त्याच्या जवळ गेले; तेव्हा त्याने त्यांना ओळखून घेतले; आणि त्यांनी त्याला ओळखले नाही[१०]. (५८)

وَلَمَّا جَهَّزَهُم بِجَهَازِهِمۡ قَالَ ٱئۡتُونِي بِأَخٖ لَّكُم مِّنۡ أَبِيكُمۡۚ أَلَا تَرَوۡنَ أَنِّيٓ أُوفِي ٱلۡكَيۡلَ وَأَنَا۠ خَيۡرُ ٱلۡمُنزِلِينَ ﴿٥٩﴾

आणि जेव्हा त्यांना त्यांचे सामान तयार करून दिले; तेव्हा म्हटले की, तुम्ही माझ्याजवळ त्या भावाला सुध्दा आणावे, जो तुमच्या वडिलांकडून आहे; काय तुम्ही पाहिले नाही की, मी माप सुध्दा पुरे पुरे दिले, आणि मी चांगला पाहुणचार करणाऱ्यांमधून आहे[११]. (५९)

فَإِن لَّمۡ تَأۡتُونِي بِهِۦ فَلَا كَيۡلَ لَكُمۡ عِندِي وَلَا تَقۡرَبُونِ ﴿٦٠﴾

मग जर तुम्ही त्याला घेऊन माझ्याकडे आला नाहीत, तर माझ्या कडून तुम्हास कुठलेही माप मिळणार नाहीं. किंबहुना तुम्ही माझ्या जवळ पण फटकू नका[१२]. (६०)

قَالُواْ سَنُرَٰوِدُ عَنۡهُ أَبَاهُ وَإِنَّا لَفَٰعِلُونَ ﴿٦١﴾

त्यांनी म्हटले बरे तर, आम्ही त्याच्या बापाशी या संबंधात बातचित करुन पूर्ण प्रयत्न करु[१३]. (६१)

१) याला जर ह. यूसुफ عليه السلام चे म्हणणे मान्य केले जाईल, तर इन्कशारी म्हणून आहे, नाहीतर स्पष्ट जाहीर आहे की, त्यांचे निष्कलंकत्व, सर्वप्रकारे सिध्द होऊन चुकले होते. आणि जर हे अजीजच्या पत्नीचे म्हणणे आहे. (जसे की इमाम इब्ने कसीर चा विचार आहे) तर हे वास्तवावर आधारित आहे की, कारण की तिने आपल्या गुन्हयाचा आणि ह. यूसुफ عليه السلام ला बहकविण्याला, फुसलावण्याला मान्य करून घेतले.

२) हे तिने आपल्या चुकीचे कारण किंवा सबब सांगितली की, माणसाचा जीवच असा आहे की, त्याला वाईट कृत्य करण्यावर उभारत असतो.

३) म्हणजे जिवाच्या खोडसाळपणापासून तोच वाचतो, ज्यावर अल्लाहतआलाची दया होईल जसे कीं ह. यूसुफ عليه السلام ला अल्लाहतआलाने वाचवून घेतले.

४) जेव्हा बादशाह (रय्यान बिन वलीद) वर, यूसुफ عليه السلام चा ज्ञान आणि तत्त्व दर्शिते बरोबर, त्यांच्या कर्तृत्वाची महत्ता, आणि निष्कलंकतापण स्पष्ट होऊन गेली; तर त्याने आज्ञा दिली की, त्यांना माझ्यासमोर उभे करा. मी त्यांना आपल्या करिता निवडून घेणे म्हणजे आपला सोबती, आणि खास सल्लागार, बनवू इच्छितो.

५) 'मकीन' मर्तबावाला, अमीन, राज्याचे गुप्तभेद जाणणारा.

६) 'खजाईन' 'खिजानतुन' चे अनेक वचन आहे. खजीना अशा जागेला म्हणतात, ज्यात वस्तु संरक्षित केल्या

जातात. जमिनीच्या खजीन्याने अभिप्रेत, ते गोदाम आहे, जेथे धान्य साठविले जात होते त्याची व्यवस्था आपल्या हातात घेण्याची इच्छा, यासाठी व्यक्त केली की, नजीकच्या भविष्यकाळात (स्वप्नाच्या भाकिताप्रमाणे) जे दुष्काळाचे दिवस येणार आहेत, त्याला निपटण्यासाठी, योग्य ती व्यवस्था केली जाऊ शकावी. आणि धान्याचा पुरेसा सांठा वांचवून ठेवला जाऊ शकावा. सर्व साधारण परिस्थितीमध्ये, जरी पद आणि अधिकाराची मागणी योग्य नाही. परंतु ह.यूसुफ عليه السلام च्या अशी पावले उचलण्याने, असे वाटते की, विशिष्ट परिस्थितीत, जर कोणी मनुष्य, असे समजतो की, समाज आणि राष्ट्राला जे धोके पुढे येणार आहे, आणि त्याचा निपटारा करण्याची चांगली लायकी माझ्यात आहे, जी दुसऱ्यात नाही; तर तो आपल्या लायकीप्रमाणे, त्या खास पद आणि अधिकाराची, मागणी करू शकतो. याशिवाय ह. यूसुफ عليه السلام नी सुरवातीपासून, पद आणि अधिकाराची मागणीप केली नाही. तथापि जेव्हा इजिप्तच्या बादशाहने, त्यांना हे देऊ केले, तेव्हा त्यांनी अशा पदाची इच्छा व्यक्त केली, ज्यात त्यांना राष्ट्र आणि समाजाच्या सेवेचा भाग द्रष्टीगोचर झाला.

७) 'हफीजुन' मी याचे अशाप्रकारे संरक्षण करीन, की यातून कुठलाही अनावश्यक खर्च करणार नाही. 'अलीमुन' त्याला गोळा करणे आणि खर्च करणे, आणि त्याला सांभाळणे आणि बाहेर काढणे, याचे योग्य ज्ञान मी बाळगतो.

८) म्हणजे ह. यूसुफ عليه السلام ला. देशात, असे सामर्थ्य आणि शक्ती प्रदान केली, की बादशाह तेच करीत असे ज्याचा हुकूम ह. यूसुफ عليه السلام करीत. आणि इजिप्तच्या भूमीत अशाप्रकारे ढवळाढवळ करीत, ज्याप्रमाणे मनुष्य आपल्या घरात करतो. आणि जेथे इच्छितो तेथे रहात. संपूर्ण इजिप्त त्यांच्या देखरेखी खाली होता.

९) हे जणू प्रतिफल होते, त्यांच्या सहन शिलतेचे, जी भावांच्या, जुलूम अत्याचारावर त्यांनी पत्करली. आणि त्या उच्च विचारसरणीचा जी तुरूंगातील जीवनात त्यांनी आत्मसात करून ठेवली. ह. यूसुफ عليه السلام चे हे अधिकार पद तेच होते, ज्यावर यापूर्वी अजीजे मिस्त्र आरूढ होता; ज्याच्या पत्नीने ह. यूसुफ عليه السلام ला बहकविण्याचा सतत प्रयत्न केला होता. काही लोक म्हणतात कीं, हा बादशाह ह. यूसुफ عليه السلام च्या आवाहन आणि प्रचाराने मुसलमान होऊन गेला होता. अशाच प्रकारे काहींनी म्हटले आहे की, अजीजे मिस्त्र ज्याचे नाव इतफीर होते, वारला, तर त्याच्यानंतर, जुलेखाचे लग्न ह. यूसुफ عليه السلام बरोबर होऊन गेले. आणि दोन मुलेंपण झालीत. एकाचे नाव 'इफराईम' आणि दुसऱ्याचे 'मिशा' होते. इफराईमच युशा बिन नुन عليه السلام आणि ह. अय्यूब عليه السلام ची पत्नी रहमतचे, वडील, होते. (तफसीर इब्ने कसीर) परंतु ही गोष्ट कोण्या मजबूत रिवायतीने सिध्द नाही. म्हणून लग्नाची गोष्ट बरोबर वाटत नाही. याशिवाय त्या स्त्रिशी, जिच्या कर्तृत्वाचा डंका वाजला, असे असतांना सुध्दा, पैगंबराच्या घराशी, तिचा संबंध, फारच अयोग्य गोष्ट वाटते.

१०) ही त्यावेळची घटना आहे. जेव्हा सुबत्तेचे सात वर्षे संपून गेल्यानंतर, दुष्काळ सुरू झाला; ज्याने इजिप्त देशाच्या संपूर्ण इलाख्यांना आणि शहरांना आपल्या कवेत घेतले; येथपर्यंत की, कनआन पर्यत सुध्दा याची झळ पोंहचली जेथे ह.याकूब عليه السلام आणि ह. यूसुफ عليه السلام चे भाऊ राहत होते. ह.यूसुफ عليه السلام नी आपल्या चांगल्या नियोजनाने या दुष्काळाशी सामना करण्यासाठी जी व्यवस्था केली होती, ती कामी आली. आणि सर्व बाजूंनी, लोक ह. यूसुफ عليه السلام जवळ धान्य घेण्यासाठी येत होते. ह.यूसुफ عليه السلام ची ही प्रसिध्दी, कनआन पर्यंत पण पोहंचली की, इजिप्तचा बादशाह अशाप्रकारे धान्य विकत आहे. म्हणून वडिलांच्या आज्ञेने, हे यूसुफ عليه السلام चे भाऊ सुध्दा, घरातले भांडवल घेऊन, धान्य मिळविण्यासाठी, राजाच्या दरबारात पोहचले. जेथे ह. यूसुफ عليه السلام उपस्थित होते त्यांना हे भाऊ तर ओळखू शकले नाहीतं; परंतु ह. यूसुफ عليه السلام नी आपल्या भावांना ओळखून घेतले.

११) ह. यूसुफ عليه السلام नी अनोळखी बनून, जेव्हा आपल्या भावांची विचारपूस केली, तेव्हा त्यांनी सर्व काही सांगून टाकले; आणि हे पण सांगितले की, आम्ही दहा भाऊ यावेळी येथे उपस्थित आहोत. परंतु आमचे दुसरे दोन सावत्र भाऊ, (म्हणजे) दुसऱ्या आईकडून आणखी पण आहेत. त्यांतून एक तर जंगलात नष्ट झाला. आणि त्याच्या दुसऱ्या भावाला, वडिलांनी त्यांच्या समाधानासाठी जवळ ठेवले आहे; त्याला आमच्या बरोबर पाठविले नाहीं. ज्यावर ह. यूसुफ. عليه السلام नी म्हटले, पुढे येतांना त्याला पण बरोबर घेऊन यावे. तुम्ही पाहत नाही की मी माप पण पुरे पुरे देतो; आणि पाहुणचार पण चांगला करीतो.

१२) प्रोत्साहना बरोबर ही धमकी पण आहे की, जर अकराव्या भावाला बरोबर आणले नाही, तर न तुम्हाला धान्य मिळेल, न माझ्या कडून तुमची आव भगत होईल.

१३) म्हणजे आम्ही आपल्या बापाजवळ भावाला आणण्याची मागणी करू; आणि आम्हाला आशा आहे, कि आम्ही त्यात यशस्वी होऊ.

وَقَالَ لِفِتْيٰنِهِ اجْعَلُوْا بِضَاعَتَهُمْ فِيْ رِحَالِهِمْ لَعَلَّهُمْ يَعْرِفُوْنَهَآ اِذَا انْقَلَبُوْٓا اِلٰٓى اَهْلِهِمْ لَعَلَّهُمْ يَرْجِعُوْنَ ﴿٦٢﴾

**आणि (यूसुफने) आपल्या सेवकांना सांगितले[१] की त्यांचे भांडवल, त्यांच्याच पोत्यात ठेवून द्या,[२] की जेव्हा ते परत फिरुन आपल्या बाल बच्च्यात जातील, तेव्हा आपल्या भांडवलाला ओळखून घ्यावे की, फारच शक्यता आहे की, त्यांनी परत यावे.** (६२)

فَلَمَّا رَجَعُوْٓا اِلٰٓى اَبِيْهِمْ قَالُوْا يٰٓاَبَانَا مُنِعَ مِنَّا الْكَيْلُ فَاَرْسِلْ مَعَنَآ اَخَانَا نَكْتَلْ وَاِنَّا لَهٗ لَحٰفِظُوْنَ ﴿٦٣﴾

**जेव्हा ते लोक परतून आपल्या वडीलांकडे गेले, तर म्हणू लागले की, आमच्यापासून धान्याचे माप रोकून घेण्यात आले.[३] आता आपण आमच्या बरोबर, आमच्या भावाला पाठवावे की, आम्ही माप भरुन आणावे. आम्ही त्याच्या संरक्षणाला जबाबदार आहोत.** (६३)

قَالَ هَلْ اٰمَنُكُمْ عَلَيْهِ اِلَّا كَمَآ اَمِنْتُكُمْ عَلٰٓى اَخِيْهِ مِنْ قَبْلُ ۭ فَاللّٰهُ خَيْرٌ حٰفِظًا ۠ وَّهُوَ اَرْحَمُ الرّٰحِمِيْنَ ﴿٦٤﴾

**(याकूबने) म्हटले, मला तर याच्या बाबतीत तुमचा बस असाच भरोसा आहे, जसा याच्यापूर्वी त्याच्या भावाच्या बाबतीत होता.[४] बस अल्लाहच उत्तम संरक्षणकर्ता आहे. आणि तो सर्व दया करणाऱ्यात उत्तम दयाकर्ता आहे.[५]** (६४)

وَلَمَّا فَتَحُوْا مَتَاعَهُمْ وَجَدُوْا بِضَاعَتَهُمْ رُدَّتْ اِلَيْهِمْ ۭ قَالُوْا يٰٓاَبَانَا مَا نَبْغِيْ ۭ هٰذِهٖ بِضَاعَتُنَا رُدَّتْ اِلَيْنَا ۚ وَنَمِيْرُ اَهْلَنَا وَنَحْفَظُ اَخَانَا وَنَزْدَادُ كَيْلَ بَعِيْرٍ ۭ ذٰلِكَ كَيْلٌ يَّسِيْرٌ ﴿٦٥﴾

**जेव्हा त्यांनी आपले सामान उघडले, तेव्हा ते आपले भांडवल (जसेच्या तसे) पावले, जे त्यांच्याकडे परतवून दिले गेले होते; म्हणू लागले, हे आमच्या पित्या! आम्हास आणखी काय हवे?[६] पहा तर! हे आमचे भांडवल पण आम्हास परत करुन देण्यात आले आहे. आम्ही आपल्या कुटूंबाला धान्य आणून देऊ; आणि भावाची काळजी घेऊ आणि एका उंटाचे माप जास्त आणू;[७] हे माप (आणणे) तर फार सोपे आहे.[८]** (६५)

१) 'फित्यान' (तरूण) ने अभिप्रेत ते नोकर चाकर, आणि सेवक व दास आहेत, जे बादशाहच्या दरबारात तैनात होते.
२) याने अभिप्रेत ते भांडवल आहे, जे धान्य खरीदण्यासाठी यूसुफच्या भावांनी बरोबर आणले होते. 'रिहाल' ने अभिप्रेत त्यांचा सामान आहे. पैसे, गुपचुप त्यांच्या सामानांत यासाठी ठेववून दिले की शक्यता आहे, पुन्हा दुसऱ्यादा येण्याला त्यांचेजवळ, आणखी पैसे नसले, तर हेच पैसे घेऊन येऊन लागतील. काही म्हणतात की, भावांकडून धान्याची किंमत घेणे त्यांना आवडले नाही म्हणून पैसे परत ठेववून दिले.
३) अर्थ हा आहे की, पुढील काळात धान्य देणे, बिनयामीनला पाठवण्यावर अवलबून आहे. जर तो बरोबर गेला नाहीं, तर धान्य मिळणार नाही. म्हणून त्याला जरूर बरोबर पाठवा; कारण की आम्हास दुसऱ्यादा सुध्दा अशाच प्रकारे धान्य मिळू शकावे. ज्याप्रमाणे यावेळी मिळाले आहे. आणि अशा प्रकारचे भय बाळगू नका,जे यूसुफला पाठवतांना तुम्हाला वाटत होते.आमही त्याचे संरक्षण करू.
४) म्हणजे तुम्ही यूसुफला पण बरोबर नेतांना, अशाच प्रकारे संरक्षणाचा वायदा केला होता. परंतु जे काही घडले, ते समोर आहे. आता मी कशा प्रकारे तुमच्यावर भरोसा करावा?
५) तथापि धान्याची आवश्यकता फारच तीव्र होती; म्हणून भय असून सुध्दा, बिनयामीनला सोबत पाठविण्याला नकार देणे योग्य समजले नाहीं. आणि अल्लाहवर भरोसा करीत त्याला पाठविण्याला तयार असण्याचे जाहीर करून टाकले.
६) म्हणजे बादशाहच्या या सदवर्तनानंतर, की त्याने आमचा पाहुणचार आणि आवभगत पण खूप केली; आणि आमचे पैसे पण परत करून दिले. आणखी आम्हास काय हवे?
७) कारण कीं एका उंटावरच्या सारखे ओझे, जे तो उचलू शकत होता, , धान्य दिले जात होते. बिनयामीनमुळे, एका उंटाची भरती आणखी मिळाली असती.
८) याचा एक अर्थ तर हा आहे की, बादशाहसाठी आणखी एका उंटाची भरती, काही कठीण गोष्ट नाही, ही तर सोपी आहे. दुसरा अर्थ हा आहे की, 'जालेका ' चा इशारा, त्या धान्याकडे आहे जे बरोबर आणले होते; आणि 'यशीरून' म्हणजे थोडेसे आहे. म्हणजे जे धान्य आम्ही बरोबर आणले आहे, ते थोडेसे आहे. बिनयामीनच्या बरोबर जाण्याने, आम्हास काही धान्य आणखी मिळून जाईल, तर चांगलीच गोष्ट आहे. आमची आवश्यकता आणखी जास्त चांगल्या रीतीने, पूर्ण होऊ शकेल.

قَالَ لَنۡ اُرۡسِلَهٗ مَعَكُمۡ حَتّٰى تُؤۡتُوۡنِ مَوۡثِقًا مِّنَ اللّٰهِ لَتَاۡتُنَّنِىۡ بِهٖۤ اِلَّاۤ اَنۡ يُّحَاطَ بِكُمۡ‌ۚ فَلَمَّاۤ اٰتَوۡهُ مَوۡثِقَهُمۡ قَالَ اللّٰهُ عَلٰى مَا نَقُوۡلُ وَكِيۡلٌ ﴿۶۶﴾

**याकूबने म्हटले की मी कधीच त्याला तुमच्या सोबत पाठवणार नाही; जोपर्यंत की तुम्ही अल्लाहाला साक्ष ठेवून मला वचन देणार नाही, की, तुम्ही त्याला माझ्यापर्यंत परत आणून पोहचवाल; शिवाय एका या प्रकारात, की, सर्व अटक केले जाल.[१] मग जेव्हा त्यांनी पक्के वचन देऊन टाकले, तेव्हा त्याने म्हटले की, आम्ही जे काही सांगत आहोत, अल्लाहतआला त्यावर साक्ष आहे. ६६**

وَقَالَ يٰبَنِىَّ لَا تَدۡخُلُوۡا مِنۡۢ بَابٍ وَّاحِدٍ وَّادۡخُلُوۡا مِنۡ اَبۡوَابٍ مُّتَفَرِّقَةٍ‌ ؕ وَمَاۤ اُغۡنِىۡ عَنۡكُمۡ مِّنَ اللّٰهِ مِنۡ شَىۡءٍ‌ ؕ اِنِ الۡحُكۡمُ اِلَّا لِلّٰهِ‌ ؕ عَلَيۡهِ تَوَكَّلۡتُ‌ ۚ وَعَلَيۡهِ فَلۡيَتَوَكَّلِ الۡمُتَوَكِّلُوۡنَ ﴿۶۷﴾

**आणि (याकूबने) म्हटले हे माझ्या मुलांनो! तुम्ही सर्व एका दरवाज्याने दाखल होऊ नका; किंबहुना वेगवेगळ्या दरवाज्यांनी, वेगवेगळे होऊन प्रवेश करावा.[२] अल्लाह कडून येणाऱ्या कोण्या गोष्टीला, तुमच्या वर टाळू शकत नाहीं. हुकूम फक्त अल्लाहचाच चालतो;[३] माझा पूर्ण भरोसा त्याच्यावरच आहे, आणि प्रत्येक भरोसा करणाऱ्याला, त्याच्यावरच भरोसा केला पाहिजे. ६७**

وَلَمَّا دَخَلُوۡا مِنۡ حَيۡثُ اَمَرَهُمۡ اَبُوۡهُمۡ‌ ؕ مَا كَانَ يُغۡنِىۡ عَنۡهُمۡ مِّنَ اللّٰهِ مِنۡ شَىۡءٍ اِلَّا حَاجَةً فِىۡ نَفۡسِ يَعۡقُوۡبَ قَضٰٮهَا‌ ؕ وَاِنَّهٗ لَذُوۡ عِلۡمٍ لِّمَا عَلَّمۡنٰهُ وَلٰـكِنَّ اَكۡثَرَ النَّاسِ لَا يَعۡلَمُوۡنَ ﴿۶۸﴾

**आणि मग ते त्याच मार्गांनी, ज्याचा हुकूम त्यांच्या बापाने त्यांना दिला होता, गेले. काहीच नव्हते की, अल्लाहने जी गोष्ट निश्चित केली आहे, ती त्यांना यापासून जरा सुध्दा वांचवू शकेल. बस एवढेच आहे की, याकूबने मनाच्या एका आकांक्षेला,[४] पूर्ण करून घेतले. तो आमच्या शिकवलेल्या ज्ञानाचा(खरोखरच एक) ज्ञानी होता; परंतु बहुतेक लोक हे जाणत नाहीत.[५] ६८**

१) म्हणजे तुम्हा सर्वांस एकत्रीत संकट येऊन जाईल, किंवा तुम्ही सर्व मारले जाल, किंवा कैद केले जाल, ज्यावर सुटकेला तुम्ही समर्थ न व्हाल, तर वेगळी गोष्ट आहे. या स्वरूपात तुम्ही लाचार व्हाल.

२) जेव्हा बिनयामीन सहित अकरा भाऊ इजिप्तला जाऊ लागले, तेव्हा सूचना दिली की एकाच बापाची अकरा मुले, जे उंची आणि धष्टपुष्टतेत, आणि चेहऱ्या मोहऱ्यात पण चांगले असावे, जेव्हा एकत्रित एकाच जागी, किंवा बरोबर बरोबर कुठून जातील, तर सर्व साधारणपणे लोक त्यांना आश्चर्याने किंवा मत्सराने पाहतात. आणि हीच गोष्ट नजर लागून जाण्याला कारणीभूत होते. म्हणून त्यांना वाईट नजरेने वाचविण्यासाठीं, युक्ती म्हणून हा हुकूम देण्यात आला नजर लागून जाणे सत्य आहे. जसे की, नबी करीम ﷺ कडून पण सहीह हदीशींनी साबीत आहे. उदाहरणार्थ, ''नजरचे लागून जाणे सत्य आहे.'' (स.बुखारी, .स.मुस्लिम,) आणि आपण ﷺ नी वाईट नजरे पासून वाचण्या करिता दुआचे शब्द पण आपल्या उम्मतला सांगितले आहेत. उदाहणार्थ फर्माविले कीं, जेव्हा तुम्हास एखादी वस्तू चांगली वाटेल, तर बारकल्लाह! म्हणा. (मुवतता इमाम मालिक) ज्याची नजर लागेल, त्याला सांगण्यात यावे की, त्याने गुसल करावे व हे गुसलचे हे पाणी, त्या मनुष्याच्या डोक्यावर आणि शरीरावर टाकण्यात यावे, ज्याला नजर लागली असेल. (हवाला वर उल्लेख केलेला) अशाच प्रकारे ''माशा अल्लाहु ला कुव्वता इल्ला बिल्लाह'' पढणे, कुरआनाने सिध्द आहे.(सू.कहफ-३९) ''कुल आऊज़ोबिरब्बिल फलक'' आणि ''कुल आऊजो बिरब्बिननास'' नजरेसाठी, दम म्हणून पढले पाहिजे.(जामे तिर्मिझी)

३) म्हणजे ही ताकीद, उघड साधन सामुग्री, काळजी घेणे, आणि युक्ती म्हणून आहे, जिला अंगिकारण्याचा माणसांना हुकूम देण्यात आला आहे. तथापि याच्यामुळे अल्लाहच्या (निश्चित केलेल्या) प्रारब्धांत, आणि हुकूमात बदल होऊ शकत नाही तेच होईल, जे याच्या ठरविल्याप्रमाणे, त्याचा हुकूम असेल.

४) म्हणजे या युक्तीने, अल्लाहने (निश्चीत केलेल्या) प्रारब्धाला तर टाळले जाऊ शकत नाही. तथापि ह. याकूब عليه السلام .च्या मनामध्यें, जे (नजरेबद्द लागून जाण्याचे) भय होते, याला नजरे समोर ठेवून त्यांनी असे म्हटले.

५) म्हणजे ही युक्ती अल्लाहच्या वहयच्या अनुषंगाने होती. आणि ही श्रध्दा पण की, 'हजर' (सांभाळून उचललेली पाउले) अल्लाहच्या मर्जीला टाळू शकत नाही; अल्लाहच्या शिकविलेल्या ज्ञानावर आधारित होते, ज्यापासून बहुतेक लोक अजाण आहेत.

وَلَمَّا دَخَلُوا عَلَىٰ يُوسُفَ آوَىٰ إِلَيْهِ أَخَاهُ قَالَ إِنِّي أَنَا أَخُوكَ فَلَا تَبْتَئِسْ بِمَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿٦٩﴾

**आणि हे सर्व, जेव्हा यूसुफजवळ पोहचून गेले, तेव्हा त्याने आपल्या भावाला आपल्या जवळ बसवून घेतले; आणि सांगितले की, मी तुझा भाऊ (यूसुफ) आहे. हे जे काही करीत राहिलेत, याचे दु:ख करू नकोस.[१]** ﴿٦٩﴾

فَلَمَّا جَهَّزَهُم بِجَهَازِهِمْ جَعَلَ السِّقَايَةَ فِي رَحْلِ أَخِيهِ ثُمَّ أَذَّنَ مُؤَذِّنٌ أَيَّتُهَا الْعِيرُ إِنَّكُمْ لَسَارِقُونَ ﴿٧٠﴾

**मग जेव्हा, त्यांना त्यांचा सामान सुमान ठीक ठाक करून दिला, तर आपल्या भावाच्या सामानांत, पाणी प्यावयाचा[२] प्याला ठेवून दिला. मग एका दवंडी देणाऱ्याने दवंडी देऊन सांगितले की, हे काफिल्यावाल्यांनो![३] तुम्ही लोक चोर आहात.[४]** ﴿٧٠﴾

قَالُوا وَأَقْبَلُوا عَلَيْهِم مَّاذَا تَفْقِدُونَ ﴿٧١﴾

**त्यांनी त्याच्याकडे तोंड करून विचारले तुमची कोणती वस्तु हरविली आहे.** ﴿٧١﴾

قَالُوا نَفْقِدُ صُوَاعَ الْمَلِكِ وَلِمَن جَاءَ بِهِ حِمْلُ بَعِيرٍ وَأَنَا بِهِ زَعِيمٌ ﴿٧٢﴾

**उत्तर दिले की, बादशहचा प्याला हरविला आहे; जो त्याला आणून देईन, त्याला एका उंटाच्या ओझ्याइतके धान्य मिळेल. या वायद्याला मी जामीन आहे.[५]** ﴿٧٢﴾

قَالُوا تَاللَّهِ لَقَدْ عَلِمْتُم مَّا جِئْنَا لِنُفْسِدَ فِي الْأَرْضِ وَمَا كُنَّا سَارِقِينَ ﴿٧٣﴾

**त्यांनी म्हटले अल्लाह शपथ! तुम्ही चांगल्याप्रकारे जाणतात की, आम्ही (या) देशात फिसाद फैलाविण्यासाठी आलो नाहीत. तसेच आम्ही चोरपण नाहीत.[६]** ﴿٧٣﴾

قَالُوا فَمَا جَزَاؤُهُ إِن كُنتُمْ كَاذِبِينَ ﴿٧٤﴾

**त्यांनी म्हटले की बरे! चोराची काय शिक्षा आहे? जर तुम्ही लबाड निघालांत.[७]** ﴿٧٤﴾

قَالُوا جَزَاؤُهُ مَن وُجِدَ فِي رَحْلِهِ فَهُوَ جَزَاؤُهُ كَذَٰلِكَ نَجْزِي الظَّالِمِينَ ﴿٧٥﴾

**उत्तर दिले की याची सजा तीच आहे की, ज्याच्या सामानात, तो आढळून येईल, तोच त्याचा बदला आहे.[८] आम्ही तर अशा जालिमांना, अशीच शिक्षा देत असतो.[९]** ﴿٧٥﴾

१) काहीं म्हणतात की, दोन दोन माणसांना, एका एका खोलीत थांबविण्यात आले. अशाप्रकारे बिनयामीन जेव्हा एकटे राहून गेले, तेव्हा ह. यूसुफ عليه السلام. ना त्यांना एकटे वेगळ्या एका खोलीत ठेवले, मग एकातात त्यांच्याशी गोष्टी केल्या. आणि त्यांना मागील गोष्टी सांगून, सांगितले की, या भावांनी माझ्या बरोबर, जे काही केले, याच्यावर दु:ख करू नकोस. काही म्हणतात की बिनयामीनला रोकण्यासाठी जो बहाणा अंगीकारावयाचा होता, त्याची पण त्यांना कल्पना दिली होती. कारण की त्यांनी चिंतीत होऊ नये. (इब्ने कसीर)

२) काही भाष्यकारांनी असे सांगितले आहे की, हा प्याला (पाणी पिण्याचे भांडे) सोने किंवा चांदीचा होता. पाणी पिण्याशिवाय, धान्य मोजण्याचे काम पण त्याच्यापासून घेण्यात येत असे. त्याला गुपचुप, बिनयामीनच्या सामानात, ठेवून देण्यांत आले.

३) 'ईर' मुळांत, त्या उंट, गाढव, किंवा खेचरांना म्हणण्यात येते, ज्यांच्यावर धान्य लादून नेण्यात येते. येथे अभिप्रेत काफिल्यावाले लोक आहेत.

४) चोरीचा हा संबंध, आपल्या जागी बरोबर होता कारण की दवंडी देणारा, ह. यूसुफ عليه السلام. च्या या विचारपूर्वक केलेल्या मनसुब्याशी परिचित नव्हता. (म्हणजे त्याला हा मनसुबा ठाऊक नव्हता ) याचा अर्थ हा आहे की, तुमची स्थिती तर चोरांसारखी आहे. की बादशाहचा प्याला, त्याच्या परवानगी शिवाय, तुमच्या सामानांत आहे.

५) म्हणजे मी या गोष्टीला जामीन राहतो की, चौकशीच्या पूर्वीच जो मनुष्य बादशाहचा हा पेला, आमच्या हवाली करुन देईन, तर त्याला बक्षीस किंवा, मोबदला म्हणून, इतके धान्य देण्यात येईल, जे एक उंट उचलू शकेल.

६) यूसुफचे भाऊ कारण की या मनसुब्यापासून अजाण होते; जो ह. यूसुफ عليه السلام नी रचला होता, म्हणून त्यांनी शपथ खाऊन, आपल्या चोर होण्याची आणि देशात फिसाद फैलाविण्याची नाकारणी केली.

७) म्हणजे जर तुमच्या सामानात, तो बादशहचा प्याला आढळून आला, तर त्याची काय शिक्षा राहील?

८) म्हणजे चोराला काही काळापर्यंत, त्या माणसाच्या ताब्यात दिले जात असे, ज्याची त्याने चोरी केलेली असे. ही ह. याकूब عليه السلام च्या धर्मशास्त्रात शिक्षा होती. जिच्याप्रमाणे ह. यूसुफ عليه السلام च्या भावांनी, ही शिक्षा सुचविली.

९) हे म्हणणे पण यूसुफच्या भावांचे आहे. काहींच्या जवळ हे यूसुफच्या साथीदारांचे म्हणणे आहे; की, त्यांनी म्हटले की, आम्ही सुध्दा जालिमांना अशीच शिक्षा देत असतो. परंतु महावाक्याचा पुढचा भाग की, ''बादशाहच्या धर्मानुसार ते आपल्या भावाला पकडू शकत नव्हते.'' या म्हणण्याला नाकारतो.

فَبَدَاَ بِاَوْعِيَتِهِمْ قَبْلَ وِعَآءِ اَخِيْهِ ثُمَّ اسْتَخْرَجَهَا
مِنْ وِّعَآءِ اَخِيْهِ ؕ كَذٰلِكَ كِدْنَا لِيُوْسُفَ ؕ مَا كَانَ
لِيَاْخُذَ اَخَاهُ فِيْ دِيْنِ الْمَلِكِ اِلَّآ اَنْ يَّشَآءَ اللّٰهُ ؕ
نَرْفَعُ دَرَجٰتٍ مَّنْ نَّشَآءُ ؕ وَفَوْقَ كُلِّ ذِيْ عِلْمٍ
عَلِيْمٌ ﴿٧٦﴾

**मग, यूसुफने त्याच्या सामानांची झडती घेणे सुरु केले; आपल्या भावाच्या सामानाच्या झडतीपूर्वी. मग या प्याल्याला आपल्या भावाच्या सामानातून काढले.(१) आम्ही यूसुफासाठी अशाच प्रकारे युक्ती काढली(२); या बादशाहच्या न्यायाचे दृष्टीने, तो आपल्या भावाला ठेवू शकत नव्हता(३); परंतु हे की जे अल्लाहल्ला मंजुर असेल; आम्ही ज्यांचे इच्छितो, त्यांचे दर्जे उंच करीतो (४). आणि प्रत्येक ज्ञानी वर वरचढ असा दुसरा ज्ञानी अस्तित्वात आहे (५) (७६)**

قَالُوْٓا اِنْ يَّسْرِقْ فَقَدْ سَرَقَ اَخٌ لَّهٗ مِنْ قَبْلُ ۚ
فَاَسَرَّهَا يُوْسُفُ فِيْ نَفْسِهٖ وَلَمْ يُبْدِهَا لَهُمْ ۚ قَالَ
اَنْتُمْ شَرٌّ مَّكَانًا ۚ وَاللّٰهُ اَعْلَمُ بِمَا تَصِفُوْنَ ﴿٧٧﴾

**त्यांनी म्हटले की जर त्याने चोरी केली, तर त्याचा भाऊ पण पूर्वी चोरी करुन चुकला आहे (६). यूसुफने ही गोष्ट आपल्या मनात ठेवून घेतली, आणि त्यांच्या समोर बिलकुल जाहीर केले नाही. (आणि) म्हटले की, तुम्ही फारच निकृष्ट दर्जाचे लोक आहात.(७) आणि जे तुम्ही सांगत आहात, त्याला अल्लाहच फार चांगल्या प्रकारे जाणतो. (७७)**

قَالُوْا يٰٓاَيُّهَا الْعَزِيْزُ اِنَّ لَهٗٓ اَبًا شَيْخًا كَبِيْرًا فَخُذْ
اَحَدَنَا مَكَانَهٗ ۚ اِنَّا نَرٰىكَ مِنَ الْمُحْسِنِيْنَ ﴿٧٨﴾

**त्यांनी म्हटले की, हे अजीजे मिस्त्र!(८) याचे वडील, फार मोठ्या वयाचे, फारच वृध्द मनुष्य आहेत; आपण याच्या बदल्यात आमच्यातून कोणाला ठेवून घ्या. आम्ही पाहतो की तुम्ही फारच परोपकारी मनुष्य आहात.(९) (७८)**

قَالَ مَعَاذَ اللّٰهِ اَنْ نَّاْخُذَ اِلَّا مَنْ وَّجَدْنَا مَتَاعَنَا
عِنْدَهٗٓ ۙ اِنَّآ اِذًا لَّظٰلِمُوْنَ ﴿٧٩﴾

**यूसुफने म्हटले की, आम्हाला ज्याच्याजवळ आमची वस्तू आढळून आली आहे, त्याच्याशिवाय दुसऱ्याला अटक करण्यापासून, अल्लाहला शरण जातो, असे केल्याने खचितच आम्ही अन्याय करणारे होऊन जाऊ. (७९)**

१) पहिले भावांच्या सामानाची झडती घेतली. शेवटी बिनयामीनचा सामान बघितला; कारण की त्यांना शंका येऊ नये की, हा कोणी विचारपूर्वक केलेला प्लॅन आहे.

२) म्हणजे आम्ही वह्याच्या मार्फत, यूसुफ (अलैहिस्सलाम) ला युक्ती सुचविली. याने ठाऊक झाले की, कोण्या बरोबर आवश्यकतेसाठी, अशी पध्दत अंगिकारणे, ज्याचे उघड स्वरुप, बहाणे करणे असेल, योग्य आहे. या अटीवर की ती पध्दत कोण्या धर्मशास्त्रीय स्पष्ट हुकूमाच्या विरुध्द नसावी. (फत्हुल कदीर)

३) म्हणजे बादशाहच्या इजिप्तमध्ये, जो कायदा आणि पध्दती, लागू होती, त्याच्या अनुषंगाने, बिनयामीनला अशाप्रकारे थांबवून ठेवणे, शक्य नव्हते. म्हणून त्यांनी काफल्यावाल्यांनाच विचारले, ''सांगा! की या अपराधाची काय शिक्षा असावी''?

४) ज्ञान आणि ओळख, चमत्कार आणि देगण्यांच्या मार्फत, ज्याप्रमाणे आम्ही यूसुफचा दर्जा उच्च केला.

५) म्हणजे प्रत्येक ज्ञानी पेक्षा वरचढ कोणी ना कोणी ज्ञानी असतोच; म्हणून कोणीही ज्ञान वाल्याने या भ्रमात व्यस्त राहू नये की, मीच या आपल्या काळाचा, सगळ्यात मोठा ज्ञानी आहे. आणि काही म्हणतात की, याचा अर्थ हा आहे की, प्रत्येक ज्ञानवंताच्या वर एक 'अलीम (ज्ञानवंत) म्हणजे अल्लाहतआलाच आहे.

६) हे त्यांनी आपले पावित्र्य आणि सज्जनता दाखविण्यासाठी सांगितले. कारण की, ह. यूसुफ (अलैहिस्सलाम) आणि बिनयामीन हे त्याचे सख्खे आणि वास्तविक भाऊ नव्हते. सावत्रभाऊ (एक बाप व वेगळी आई असलेले) होते. काही भाष्यकारांनी, यूसुफच्या चोरीसाठी, वेगवेगळ्या गोष्टी नमुद केल्या आहेत; ज्या कोणी मजबूत सनदीवर आधारित नाहीत. खरी गोष्ट अशीच वाटते की, त्यांनी आपल्याला तर फारच चारित्र्यवान आणि कर्तृत्ववान सांगितले; आणि यूसुफ (अलैहिस्सलाम) आणि बिनयामीन यांना, कमी कर्तृत्वाचे, आणि लबाडीने काम घेत, त्यांना चोर आणि बेईमान सिध्द करण्याचा प्रयत्न केला.

७) ह. यूसुफ (अलैहिस्सलाम). च्या या म्हणण्याने सुध्दा माहित पडते की, त्यांनी यूसुफ ((अलैहिस्सलाम)) कडे चोरी लावण्यामध्ये, खुल्लम् खुल्ला, खोटे बोलण्याचा अवलंब केला.

८) ह. यूसुफ (अलैहिस्सलाम). ला अजीजे मिस्त्र यासाठी म्हटले की, यावेळी मूळ अधिकार ह. यूसुफ (अलैहिस्सलाम). जवळच होते. बादशाह फक्त नावापुरताच, इजिप्तचा शासक होता.

९) वडील तर खचितच वृध्द होते. परंतु येथे त्याचा मूळ उद्देश, बिनयामीनला सोडविण्याचा होता. त्यांच्या स्मरणात तीच यूसुफ (अलैहिस्सलाम).वाली गोष्ट होती की, कोठे आम्हास, दुसऱ्यादा बिनयामीन शिवाय, बापाजवळ जाणे पडू नये. आणि वडीलांनी आपणास म्हणावे, तुम्ही माझ्या बिनयामीनला सुध्दा, यूसुफप्रमाणे कोठे हरवून टाकले. म्हणून यूसुफच्या परोपकाराचा हवाला देऊन, ही गोष्ट केली की कदाचित हा, उपकार पण करील की, बिनयामीनला सोडून देईल, आणि त्याच्या ऐवजी आणखी कोणा भावाला ठेऊन घेईल.

فَلَمَّا اسْتَيْـَٔسُوْا مِنْهُ خَلَصُوْا نَجِيًّا ۗ قَالَ كَبِيْرُهُمْ اَلَمْ تَعْلَمُوْٓا اَنَّ اَبَاكُمْ قَدْ اَخَذَ عَلَيْكُمْ مَّوْثِقًا مِّنَ اللّٰهِ وَمِنْ قَبْلُ مَا فَرَّطْتُّمْ فِیْ یُوْسُفَ ۚ فَلَنْ اَبْرَحَ الْاَرْضَ حَتّٰى یَاْذَنَ لِیْۤ اَبِیْۤ اَوْ یَحْكُمَ اللّٰهُ لِیْ ۚ وَهُوَ خَیْرُ الْحٰكِمِیْنَ ﴿٨٠﴾

जेव्हा ते त्याच्यापासून निराश होऊन गेले तर एकातात बसून सल्लामसलत करू लागले.[१] त्यांच्यातून जो सर्वात मोठा होता, त्याने म्हटले काय तुम्हास ठाऊक नाही की, तुमच्या वडिलांनी तुमच्याशी अल्लाहला मध्ये ठेवून पक्के वचन घेतले आहे? आणि याच्यापूर्वी यूसुफच्या बाबतीत तुम्ही कसूर करुन चुकला आहात. बस मी तर या भूमीतून कधीच हटणार नाही, जोपर्यंत की, वडील स्वत: मला परवानगी देणार नाही[२]. किंवा अल्लाहतआला माझ्या या मामल्याचा फैसला करून देईन; आणि अल्लाहच सर्वांत उत्तम हुकूम करणारा आहे.[३] (८०)

اِرْجِعُوْۤا اِلٰۤى اَبِیْكُمْ فَقُوْلُوْا یٰۤاَبَانَاۤ اِنَّ ابْنَكَ سَرَقَ ۚ وَمَا شَهِدْنَاۤ اِلَّا بِمَا عَلِمْنَا وَمَا كُنَّا لِلْغَیْبِ حٰفِظِیْنَ ﴿٨١﴾

तुम्ही सर्व पिताजींच्या सेवेत परत जा; आणि त्यांना सांगा की, हे आमच्या पित्या! आपल्या मुलाने चोरी केली; आणि आम्ही तीच साक्ष दिली होती, जी आम्ही आणि आपण जाणत होता.[४] आम्ही काहींअदृष्टाचे संरक्षण करणारे तर नव्हतोच[५] (८१)

وَسْـَٔلِ الْقَرْیَةَ الَّتِیْ كُنَّا فِیْهَا وَالْعِیْرَ الَّتِیْۤ اَقْبَلْنَا فِیْهَا ؕ وَاِنَّا لَصٰدِقُوْنَ ﴿٨٢﴾

आपण या शहरांतील लोकांजवळ चौकशी करून घ्या, जेथे आम्ही होतो. आणि या काफल्याला पण विचारून घ्या, ज्याचेबरोबर आम्ही आलो आहोत; आणि खचितच आम्ही बिलकुल खरे आहोत[६] (८२)

قَالَ بَلْ سَوَّلَتْ لَكُمْ اَنْفُسُكُمْ اَمْرًا ؕ فَصَبْرٌ جَمِیْلٌ ؕ عَسَى اللّٰهُ اَنْ یَّاْتِیَنِیْ بِهِمْ جَمِیْعًا ؕ اِنَّهٗ هُوَ الْعَلِیْمُ الْحَكِیْمُ ﴿٨٣﴾

(याकूबने) म्हटले, असे तर नाही, किंबहुना तुम्ही आपल्याकडून, गोष्ट[७] रचून घेतली. आता सहनशिलता पत्करणे हेच उत्तम आहे. हे काही आश्चर्य नाही की, अल्लाहतआला या सर्वांना माझ्या जवळच पोंहचवून देईल.[८] तोच ज्ञानी आणि बुध्दीमान आहे. (८३)

وَتَوَلّٰى عَنْهُمْ وَقَالَ یٰۤاَسَفٰى عَلٰى یُوْسُفَ وَابْیَضَّتْ عَیْنٰهُ مِنَ الْحُزْنِ فَهُوَ كَظِیْمٌ ﴿٨٤﴾

मग त्यांच्या कडून तोंड फिरवून घेतले, आणि म्हटले हाय यूसुफ![९] त्यांचे डोळे दु:खाने पांढरे होऊन गेले होते.[१०] आणि ते दु:खामुळे (मनातल्या मनांत) कुढत होते. (८४)

قَالُوْا تَاللّٰهِ تَفْتَؤُا تَذْكُرُ یُوْسُفَ حَتّٰى تَكُوْنَ حَرَضًا اَوْ تَكُوْنَ مِنَ الْهٰلِكِیْنَ ﴿٨٥﴾

पुत्रांनी म्हटले अल्लाह शपथ! आपण नेहमी यूसुफच्या आठवणींतच लागून राहाल, येथ पावेतो की, (झुरुन झुरुन) आजारी पडून जाल, किंवा संपूनच जाल.[११] (८५)

قَالَ اِنَّمَاۤ اَشْكُوْا بَثِّیْ وَحُزْنِیْۤ اِلَى اللّٰهِ وَاَعْلَمُ مِنَ اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿٨٦﴾

त्यांनी म्हटले कीं माझ्या परेशानी आणि दु:खाची फिर्याद, अल्लाहजवळच करीत आहे. मला अल्लाहकडून त्या गोष्टी ठाऊक आहेत, ज्यांच्या पासून तुम्ही एकदम अज्ञानांत आहात.[१२] (८६)

یٰبَنِیَّ اذْهَبُوْا فَتَحَسَّسُوْا مِنْ یُّوْسُفَ وَاَخِیْهِ وَلَا تَایْـَٔسُوْا مِنْ رَّوْحِ اللّٰهِ ؕ اِنَّهٗ لَا یَایْـَٔسُ مِنْ رَّوْحِ اللّٰهِ اِلَّا الْقَوْمُ الْكٰفِرُوْنَ ﴿٨٧﴾

माझ्या प्रिय मुलांनो! तुम्ही जा आणि यूसुफ आणि त्याच्या भावाचा, चांगल्या प्रकारे शोध करा;[१३]आणि अल्लाहच्या दयेकडून निराश होऊ नका; खचितच अल्लाहच्या दयेकडून तेच निराश होतात, जे काफिर असतात.[१४] (८७)

१)कारण की, बिनयामीनला सोडून जाणे, त्यांच्यासाठी फारच कठीण समस्या होती. ते बापाला तोंड दाखविण्याच्या लायकीचे राहिले नव्हते. म्हणून आपसांत सल्लामसलत करु लागले की, आता काय केले जावे?

२) या मोठ्या भावाने या सद्यस्थितीत, बापाशी सामना करण्याची, आपल्यात हिंमत आणि ताकद, पावली नाही. म्हणून स्पष्ट सांगून टाकले की, मी तर येथून तो पावेतो जाणार नाही, जो पर्यंत स्वत: पिताजी चौकशी करून, माझ्या निर्दोष होण्याचा विश्वास न करून घेतील, आणि मला येण्याची परवानगी न देतील.

३) अल्लाह माझ्या मामल्याचा निर्णय करून देवो! चा अर्थ हा आहे की, कोण्या प्रकारे यूसुफ (अजिजे मिस्त्र) ने बिनयामीनला सोडून द्यावे, आणि माझ्या बरोबर जाण्याची परवानगी देऊन द्यावी. किंवा हा अर्थ आहे कीं, मला अल्लाहतालाने एवढे सामर्थ्य द्यावे, की बिनयामीनला तलवार किंवा शक्तीमुळे, सोडवून आपल्या बरोबर घेऊन जावे.

४) म्हणजे आम्ही जे वचन दिले होते की आम्ही बिनयामीनला काळजीपूर्वक परत आणू, तर हे आम्ही आमच्या ज्ञानाप्रमाणे, वचन दिले होते. मागून जी घटना घडून आली, आणि जिच्यामुळे, बिनयामीनला आम्हाला सोडावे लागले, हे तर आमच्या कल्पनेत पण नव्हते. दुसरा अर्थ हा आहे कीं, आम्ही चोरीची जी शिक्षा सांगितली होती, कीं, चोरालाच चोरीच्या बदल्यात ठेवून घेण्यात यावे. तर ही शिक्षा आम्ही आपल्या ज्ञानाप्रमाणेच सुचविली होती. याच्यामध्ये कोण्याप्रकारचा वाईट इरादा शामील नव्हता. परंतु नंतर ही योगायोगाची  गोष्ट होती की जेव्हां सामानांची झडती घेण्यात आली, तर चर्चित प्याला, बिनयामीनच्या सामांनात आढळून आला.

५) म्हणजे भविष्यात, पुढे येणाऱ्या घटनांशी आम्ही अजाण होतो.

६) अलकरिया ने अभिप्रेत इजिप्त आहे; जेथे ते धान्य घेण्यासाठी गेले होते. अर्थ इजिप्तवाले आहेत. अशाच प्रकारे ''ईर'' ने अभिप्रेत काफलेवाले आहेत. आपण. इजिप्तला जाऊन त्यांना आणि काफल्यावाल्यांना, जो आमच्याबरोबर आला आहे, विचारून घ्या कीं, आम्ही जे काही सांगत आहोत ते खरे आहे. यात खोट्याचा काही अंतर्भाव नाही.

७) ह. याकूब عليه السلام. कारण की परिस्थितीच्या हकीकतीपासून अजाण होते, आणि अल्लाहतआलाने सुध्दा 'वह्या' च्या मार्फत, घटनेच्या हकीकतीपासून सूचित केले नाही, म्हणून ते हेच समजले की, माझ्या या मुलांनी, ज्याप्रमाणे याच्यापूर्वी, यूसुफच्या प्रकरणात, आपल्याकडून गोष्ट रचून सांगितली होती, आता मग अशाच प्रकारे त्यांनी आपल्याकडून गोष्ट रचून घेतली आहे. बिनयामीन बरोबर त्यांनी काय मामला केला आहे? याचे खात्रीलायक ज्ञान तर, ह. याकूब عليه السلام. जवळ नव्हते; तथापि यूसुफच्या घटनेवर अंदाज करीत, त्यांच्याकडून ह. याकूब عليه السلام च्या मनांत, अशाच शंका कुशंका होत्या.

८) आता मग सहनशिलते शिवाय, आणखी कोणी उपाय नव्हता. तथापि सहनशिलते बरोबरच निराशपण झाले नाहीत. 'जमीअन' ने अभिप्रेत, यूसुफ عليه السلام बिनयामीन आणि तो मोठा मुलगा आहे; जो लज्जीत होऊन तेथेच इजिप्त मध्यें थांबला होता; की एक तर वडीलांनी मला अशाच प्रकारे येण्याची परवानगी देऊन द्यावी; नाही तर मी कशाही प्रकाराने बिनयामीनला बरोबर घेऊन यावे.

९) म्हणजे या ताज्या दु:खाने, यूसुफच्या विरहाच्या जुन्या दु:खाला पण ताजे करून दिले.

१०) म्हणजे डोळ्यांचा काळेपणा, दु:खामुळे पांढऱ्यात बदलून गेला होता.

११) 'हरज' त्या शारीरिक दुर्बलतेला किंवा बुध्दीमांद्याला, जे म्हातारपण, प्रेम, किंवा वारंवार होणाऱ्या दु:खांमुळे जे मनुष्याला प्राप्त होते; यूसुफच्या उल्लेखाने भावांचा मत्सराग्नी पुन्हां भडकून उठला; आणि आपल्या बापाला हे सांगितले.

१२) याच्याने अभिप्रेत एक तर ते स्वप्न आहे, ज्याच्याबद्दल त्यांना पक्की खात्री होती; की त्याचे भाकीत जरूर पुढें येईल, आणि ते यूसुफला नमन(सजदे) करतील. किंवा त्यांना ही खात्री होती की यूसुफ जिवंत अस्तित्वांत आहे, आणि त्याची जीवनांत जरूर भेट होईल.

१३) म्हणून या विश्वासाने ओतप्रोत होऊन, त्यांनी आपल्या मुलांना हा हुकूम दिला.

१४) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''मार्गभ्रष्ट लोकच अल्लाहच्या दयेकडून निराश होतात.'' (सू. हिज्र -५६) याचा अर्थ हा आहे की, ईमानवाल्यांना कठीणात कठीण स्थितीत सुध्दा, सहनशिलता आणि संतोषाचा, आणि अल्लाहच्या विस्तृत दयेच्या आशेला, विसरावयांस नको.

فَلَمَّا دَخَلُوا عَلَيْهِ قَالُوا يَٰٓأَيُّهَا الْعَزِيزُ مَسَّنَا وَأَهْلَنَا الضُّرُّ وَجِئْنَا بِبِضَٰعَةٍ مُّزْجَىٰةٍ فَأَوْفِ لَنَا الْكَيْلَ وَتَصَدَّقْ عَلَيْنَآ ۖ إِنَّ اللَّهَ يَجْزِي الْمُتَصَدِّقِينَ ﴿٨٨﴾

**मग जेव्हा ते लोक यूसुफच्या [१] जवळ पोंहचले, तर म्हणू लागले की हे अजीजा! आम्ही आणि आमचे कुटुंब फारच मोठ्या त्रासांत आहे. आम्ही फारच थोडे पैसे आणलेले आहेत. [२] (कृपया) आपण आम्हास धान्याचे पुरेपुर माप द्यावे. [३] आणि आम्हावर दानधर्म करावा; [४] अल्लाहतआला दान धर्म देणाऱ्यांना बदला देत असतो. ८८**

قَالَ هَلْ عَلِمْتُم مَّا فَعَلْتُم بِيُوسُفَ وَأَخِيهِ إِذْ أَنتُمْ جَٰهِلُونَ ﴿٨٩﴾

**यूसुफने म्हटले, तुम्ही जाणतात पण काय, की तुम्ही यूसुफ आणि त्याच्या भावाबरोबर, आपल्या अज्ञानपणाच्या स्थितीत, काय केले होते? [५] ८९**

قَالُوٓا أَءِنَّكَ لَأَنتَ يُوسُفُ ۖ قَالَ أَنَا۠ يُوسُفُ وَهَٰذَآ أَخِي ۖ قَدْ مَنَّ اللَّهُ عَلَيْنَآ ۖ إِنَّهُۥ مَن يَتَّقِ وَيَصْبِرْ فَإِنَّ اللَّهَ لَا يُضِيعُ أَجْرَ الْمُحْسِنِينَ ﴿٩٠﴾

**त्यांनी म्हटले की कदाचित तू च यूसुफ आहेस. [६] उत्तर दिले की, होय मीच यूसुफ आहे. आणि हा माझा भाऊ आहे.अल्लाहने आमच्यावर आपली कृपा केली. गोष्ट अशी आहे की, जो पण ईशभय आणि सहनशिलता पत्करतो, तर अल्लाहतआला सदारचरणी लोकांची पुण्यफल अक्रित करीत नसतो. [७] ९०**

قَالُوا تَاللَّهِ لَقَدْ ءَاثَرَكَ اللَّهُ عَلَيْنَا وَإِن كُنَّا لَخَٰطِـِٔينَ ﴿٩١﴾

**त्यांनी म्हटले अल्लाहची शपथ! अल्लाहतआलाने तुला आमच्यावर श्रेष्ठत्व दिले आहे. आणि हे पण बिल्कुल सत्य आहे की, आम्ही गुन्हेगार होतो. [८] ९१**

قَالَ لَا تَثْرِيبَ عَلَيْكُمُ الْيَوْمَ ۖ يَغْفِرُ اللَّهُ لَكُمْ ۖ وَهُوَ أَرْحَمُ الرَّٰحِمِينَ ﴿٩٢﴾

**उत्तर दिले की, आज तुमच्यावर काही दोष नाही. [९] आणि अल्लाह तुम्हास क्षमा करो! तो सर्व दयाकर्त्यात उत्तम दयाकर्ता आहे. ९२**

१) हे तिसऱ्यादा त्यांचे इजिप्तला जाणे आहे.

२) म्हणजे धान्य घेण्यासाठी, आम्ही जी अल्प किंमत घेऊन आलो आहोत, ती फारच थोडीशी आणि क्षुल्लक आहे.

३) म्हणजे आमच्या क्षुल्लक भांडवलाला पाहू नका; याच्या बदल्यात पुरे पुरे माप द्यावे.

४) म्हणजे आमचे क्षुल्लक भांडवल कबूल करून, आमच्यावर उपकार आणि दानधर्म करावा. आणि काही भाष्यकारांनी याचा अर्थ केला आहे की, आमच्या भाऊ बिन्यामीनला मुक्त करून, आमच्यावर उपकार करावा.

५) असे म्हणतात की जेव्हा त्यांनी अत्यंत लाचारीने, दानधर्म किंवा, भावाच्या मुक्ततेचे अपील केले, तर त्या बरोबरच वडिलांच्या म्हातारपणाचे आणि दुर्बलतेचे आणि भावाच्या विरहाचे पण वर्णन केले; तेव्हा ह. यूसुफ عليه السلام चे डोळे पाणावले, आणि ऊर पण भरून आला. आणि वस्तूस्थिती जाहीर करण्यावर मजबुर होऊन गेले. तथापि भावांच्या अत्याचाराच्या उल्लेखाच्या बरोबरच दयाळू पणाला पण जाहीर केले; की हे काम तुम्ही अशा स्थितीत केले, जेव्हा तुम्ही अडाणी आणि नादान होता.

६) भावांनी जेव्हा अजीजे मिस्त्रच्या तोंडून, त्या यूसुफचा उल्लेख ऐकला, ज्याला त्यांनी लहानपणी कन्आन मध्ये एका अंधाऱ्या विहीरीत, फेकून दिले होते. तर ते आश्चर्य चकीत पण झाले, आणि काळजीपूर्वक पाहण्याला त्यांना भाग पाडले कीं, आमच्याशी संभाषण करणारा बादशाह यूसुफ तर नाही? नाहीतर यूसुफच्या गोष्टीचे त्याला कशा प्रकारे ज्ञान होऊ शकते. म्हणून त्यांनी प्रश्न केला की, .... काय तू यूसुफच तर नाही?

७) प्रश्नाच्या उत्तरात, मान्यतेबरोबरच अल्लाहच्या उपकाराचा उल्लेख, आणि सहनशिलता आणि ईशभयाचे सुपरिणाम पण वर्णन करून, सांगून दिले की, तुम्ही तर मला नष्ट करण्यात काहीच कसर बाकी सोडली नाही. परंतु अल्लाहतआलाची कृपा आणि उपकार आहेत कीं, त्याने न फक्त हे की विहीरीतून सूटका केली, किंबहुना इजिप्तची अधिकार सुत्रे पण प्रदान केली. आणि हा परिणाम आहे, त्या सहनशिलता आणि ईशभयाचा, ज्याची सुबुध्दी अल्लाहने मला दिली.

८) भावांनी जेव्हा यूसुफचे हे वैभव पाहिले, तेव्हाआपल्या चुकीला आणि कोताईला मान्य करून घेतले.

९) ह. यूसुफ عليه السلام.नी सुध्दा पैगंबराला साजेश्या वृत्तीने, आणि क्षमा करणे याच्याने काम घेत, सांगून टाकले की जे झाले, ते झाले. आज तुम्हाला काही विचारपुस आणि तुमची निर्भत्सना केली जाणार नाही. मक्केच्या विजयाच्या दिवशी,नबी करीम ﷺ नी सुध्दा त्या काफिर आणि कुरैशच्या सरदारांना, जे आपल्या रक्ताचे तहानलेले होते, आणि आपणास तऱ्हे तऱ्हेचा त्रास दिला होता, हेच शब्द सांगून, त्यांना क्षमा करून टाकले होते ﷺ.

اِذْهَبُوْا بِقَمِيْصِيْ هٰذَا فَاَلْقُوْهُ عَلٰى وَجْهِ اَبِيْ يَاْتِ بَصِيْرًا ۚ وَاْتُوْنِيْ بِاَهْلِكُمْ اَجْمَعِيْنَ ﴿٩٣﴾

माझा हा सदरा, तुम्ही घेऊन जा, आणि त्याला माझ्या वडिलांच्या तोंडावर टाकून द्या; की ते पाहू लागतील.[1] आणि आपल्या सर्व कुटूंबाला घेऊन, माझ्याजवळ या.[2] ९३

وَلَمَّا فَصَلَتِ الْعِيْرُ قَالَ اَبُوْهُمْ اِنِّيْ لَاَجِدُ رِيْحَ يُوْسُفَ لَوْلَآ اَنْ تُفَنِّدُوْنِ ﴿٩٤﴾

जेव्हा हा काफला रवाना झाला, तेव्हा त्यांच्या वडिलांनी सांगितले की, मला तर यूसुफचा सुवास येत आहे. जर तुम्ही मला सांठाळलेला म्हणणार नाही.[3] ९४

قَالُوْا تَاللّٰهِ اِنَّكَ لَفِيْ ضَلٰلِكَ الْقَدِيْمِ ﴿٩٥﴾

ते म्हणू लागले की अल्लाह शपथ, आपण तर आपल्या पुरातन भ्रमात[4] पडलेला आहात. ९५

فَلَمَّآ اَنْ جَآءَ الْبَشِيْرُ اَلْقٰىهُ عَلٰى وَجْهِهٖ فَارْتَدَّ بَصِيْرًا ۚ قَالَ اَلَمْ اَقُلْ لَّكُمْ ۚ اِنِّيْٓ اَعْلَمُ مِنَ اللّٰهِ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿٩٦﴾

जेव्हा खुषखबर देणाऱ्याने, तेथे पोहचून त्यांच्या तोंडावर तो सदरा टाकला, त्याच वेळी ते डोळस[5] होऊन गेले; (त्यांनी) सांगितले, काय की तुम्हास सांगत नव्हतो कीं, मी अल्लाह कडून त्या गोष्टी जाणतो, ज्या तुम्ही जाणत[6] नाही. ९६

قَالُوْا يٰٓاَبَانَا اسْتَغْفِرْ لَنَا ذُنُوْبَنَآ اِنَّا كُنَّا خٰطِـِٕيْنَ ﴿٩٧﴾

त्यांनी म्हटले हे आमच्या पित्या! तुम्ही आमच्यासाठी (आमच्या) अपराधांची (अल्लाहकडे) क्षमा मागा. नि:संशय आम्हीच गुन्हेगार आहोत. ९७

قَالَ سَوْفَ اَسْتَغْفِرُ لَكُمْ رَبِّيْ ۗ اِنَّهٗ هُوَ الْغَفُوْرُ الرَّحِيْمُ ﴿٩٨﴾

(याकूबने) म्हटले, की बरे! मी तुमच्या करिता, आपल्या पालनकर्त्याकडे क्षमा याचना[7] करीन; तो मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ९८

فَلَمَّا دَخَلُوْا عَلٰى يُوْسُفَ اٰوٰٓى اِلَيْهِ اَبَوَيْهِ وَقَالَ ادْخُلُوْا مِصْرَ اِنْ شَآءَ اللّٰهُ اٰمِنِيْنَ ﴿٩٩﴾

जेव्हा सर्व कुटुंब यूसुफजवळ पोहचून गेले, तेव्हा यूसुफने आपल्या आई वडिलांना आपल्याजवळ जागा[8] दिली. आणि म्हटले की, अल्लाहला मंजुर आहे तर, आपण सर्व बिन धोक चैनीने इजिप्तमध्ये दाखल व्हा ९९

१) असे म्हणतात की हा तो सदरा होता, जो त्यावेळी ह. इब्राहिम عليه السلام नी. अंगात घातलेला होता, जेव्हा त्यांना आगीत टाकण्यांत आले. हा सदरा वंशांत चालत आला होता. ह. याकूब عليه السلام. नी हा सदरा त्यावेळी यूसुफला घातला होता जेव्हा त्यांना भावाबरोबर खेळण्या बागडण्यासाठी पाठविले होते. परंतु जास्त बरोबर ही गोष्ट वाटते की. सदऱ्याचे चेहऱ्यावर पडणे आणि डोळ्यांची दृष्ट परत येणे, एक चमत्कार म्हणून होते.

२) हे ह. यूसुफ عليه السلام.नी आपल्या पूर्ण कुटुंबाला, इजिप्तला येण्याचे आमंत्रण दिले.

३) तिकडे हा सदरा घेऊन काफला इजिप्तहून निघाला, इकडे ह. याकूब عليه السلام.ला अल्लाहकडून एक चमत्कार म्हणून , ह. यूसुफ عليه السلام चा सुवास येऊ लागला ही जणू या गोष्टीची घोषणा होती की, अल्लाहच्या पैंगबराला सुध्दा, जोपर्यंत अल्लाहतआला. कडून, पूर्व सूचना भेटणार नाही, पैगंबर अजाण असतो. मग जरी मुलगा, आपल्या शहरांतील कोण्या विहीरीत का असेना! आणि जेव्हा अल्लाहतआला व्यवस्था करून देईल, तर मग इजिप्त सारख्या दुरवरच्या इलाख्यापासून सुध्दा पुत्रांचा सुवास येऊन जातो.

४) ज़लालने अभिप्रेत, प्रेम आणि वेडेपणाची ती स्थिती आहे, जी ह. याकूब عليه السلام. ला आपला मुलगा ह. यूसुफ عليه السلام.शी होती. त्यांची मुले म्हणू लागली, आतापर्यंत आपण त्याच पुरातन भ्रमात, म्हणजे यूसुफचे प्रेमांत अडकलेले आहात. इतका लांबलचक काळ निघून गेल्यावर सुध्दा, यूसुफचे प्रेम मनांतून गेले नाही.

५) म्हणजे जेव्हा तो खुषखबर देणारा येऊन पोहोचला आणि येऊन तो सदरा , ह. याकूब عليه السلام. च्या चेहऱ्यावर टाकून दिला; तर त्यामुळे चमत्कार म्हणून,त्यांची दृष्टी, त्यांना पूर्वीप्रमाणे प्राप्त झाली.

६) कारण कीं माझ्या जवळ ज्ञानाचे एक साधन 'वह्य' पण आहे; जे तुमच्यामधून कोणाजवळ नाही. या वह्यच्या मार्फत अल्लाहतआला आपल्या पैंगबराच्या अहवालांशी, मर्जी आणि प्रयोजनानुसार, माहीत करीत असतो.

७) क्षमा आणि माफीची दुआ करण्याऐवजी, फक्त दुआ करण्याचा वायदा केला. उद्देश्य हा होता की, रात्रीच्या मागील प्रहरात, जो अल्लाहच्या खास सेवकांचा, अल्लाहची भक्ती करण्याचा खास वेळ असतो, अल्लाहशी त्यांच्या क्षमेसाठी प्रार्थना करीन.

८) म्हणजे मान सन्मानाने त्यांना आपल्या जवळ जागा दिली. आणि त्यांची खूप आवभगत केली.

وَرَفَعَ اَبَوَيۡهِ عَلَى الۡعَرۡشِ وَخَرُّوۡا لَهٗ سُجَّدًا ۚ وَقَالَ يٰۤاَبَتِ هٰذَا تَاۡوِيۡلُ رُءۡيَاىَ مِنۡ قَبۡلُ قَدۡ جَعَلَهَا رَبِّىۡ حَقًّا ؕ وَقَدۡ اَحۡسَنَ بِىۡۤ اِذۡ اَخۡرَجَنِىۡ مِنَ السِّجۡنِ وَجَآءَ بِكُمۡ مِّنَ الۡبَدۡوِ مِنۡۢ بَعۡدِ اَنۡ نَّزَغَ الشَّيۡطٰنُ بَيۡنِىۡ وَبَيۡنَ اِخۡوَتِىۡ ؕ اِنَّ رَبِّىۡ لَطِيۡفٌ لِّمَا يَشَآءُ ؕ اِنَّهٗ هُوَ الۡعَلِيۡمُ الۡحَكِيۡمُ ﴿١٠٠﴾

**आणि आपल्या सिंहासनावर आपल्या मातापित्याला [१] उंचावर बसविले. आणि सर्व त्यांच्यासमोर सजदे करत[२] पालथे पडले. तेव्हा (यूसुफने) म्हटले की, हे पिताजी! हे माझ्या पूर्वीच्या स्वप्नाचे भाकीत[३] आहे. माझ्या पालनकर्त्याने त्याला खरे करून दाखविले. त्याने माझ्यावर फारच उपकार केला; जेव्हा की मला तुरूंगातून[४] काढले; आणि तुम्हा लोकांस वाळवंटातून [५] घेऊन आला; या उपरात की शैतानाने माझ्यात आणि माझ्या भावांत वाकडेपणा आणला होता.[६] माझा पालनकर्ता जे इच्छितो, ते फार चांगल्याप्रकारे घडवून आणतो आणि तो फार जाणणारा आणि बुध्दीमान आहे. (१००)**

رَبِّ قَدۡ اٰتَيۡتَنِىۡ مِنَ الۡمُلۡكِ وَعَلَّمۡتَنِىۡ مِنۡ تَاۡوِيۡلِ الۡاَحَادِيۡثِ ۚ فَاطِرَ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ اَنۡتَ وَلِىّٖ فِى الدُّنۡيَا وَالۡاٰخِرَةِ ۚ تَوَفَّنِىۡ مُسۡلِمًا وَّاَلۡحِقۡنِىۡ بِالصّٰلِحِيۡنَ ﴿١٠١﴾

**हे माझ्या पालनकर्त्या! तू मला राज्य प्रदान केलेस.[७] आणि तू मला स्वप्नाचे भाकीत शिकवलेस[८] हे आकाश आणि पृथ्वीच्या निर्मात्या! ईहलोक आणि परलोक यात, तूच माझा वाली आहेस. तू मला मुसलमान असतानाच जगातून उचलून घे. आणि सदाचरणी लोकांत शामील करून[९] दे. (१०१)**

ذٰلِكَ مِنۡ اَنۡۢبَآءِ الۡغَيۡبِ نُوۡحِيۡهِ اِلَيۡكَ ۚ وَمَا كُنۡتَ لَدَيۡهِمۡ اِذۡ اَجۡمَعُوۡۤا اَمۡرَهُمۡ وَهُمۡ يَمۡكُرُوۡنَ ﴿١٠٢﴾

**या अदृष्टांच्या बातम्यांमधून आहे. ज्यांचे आम्ही आपणाकडे 'वह्य' करीत आहोत. तेव्हा आपण त्यांच्या जवळ नव्हता; जेव्हा की, त्यांनी आपल्या गोष्टीचा निश्चय करून घेतला होता. आणि ते चालबाजी करू लागले[१०] होते. (१०२)**

وَمَاۤ اَكۡثَرُ النَّاسِ وَلَوۡ حَرَصۡتَ بِمُؤۡمِنِيۡنَ ﴿١٠٣﴾

**जरी आपण कितीही इच्छाल , तरी बहुतेक लोक ईमान आणणार नाहीत.[११] (१०३)**

وَمَا تَسۡـَٔلُهُمۡ عَلَيۡهِ مِنۡ اَجۡرٍ ؕ اِنۡ هُوَ اِلَّا ذِكۡرٌ لِّلۡعٰلَمِيۡنَ ﴿١٠٤﴾

**आपण त्यांच्यापासून काही मोबदला तर मागत नाही.[१२] हा तर तमाम लोकांसाठी निव्वळ उपदेशच उपदेश आहे.[१३] (१०४)**

१) काही भाष्यकारांचा विचार आहे, ही सावत्रआई आणि सख्खी मावशी होती. कारण कि यूसुफची खरी आई, बिनयामीनच्या जन्मानंतर, मरण पावली होती. ह. याकूब عليه السلام. नी तिच्या मृत्यूनतंर तिच्या बहिणीशी लग्न करुन घेतले होते. हीच मावशी आता ह. याकूब عليه السلام. बरोबर इजिप्तला गेली होती. (फत्हुल कदीर) परंतु इमाम इब्ने जरीर तबरीने याच्या उलट हे सांगितले आहे की, यूसुफची आई मृत्यु पावली नव्हती आणि तीच खरी आई बरोबर होती. (इब्ने कसीर)

२) काहींनी याचे भाषांतर केले आहे की, मान देणे व गौरव करण्यासाठी, यूसुफ समोर वाकले. परंतु ''वखरू लहु सुज्जदन'' चे शब्द सांगतात कीं, ते जमिनीवर यूसुफा समोर सजदे करत पालथे पडले. म्हणजे हा सजदा, सज्दाच्याच अर्थांत आहे. तथापि हा सज्दा ताजीमी( म्हणजे सन्मानार्थ) आहे, उपासनेचा सज्दा नाही आणि हा सजदा-ए-ताजीमी, ह. याकूब عليه السلام. च्या धर्मशास्त्रांत जाएज् (योग्य) होता. इस्लाम मध्ये शिर्कच्या खंडनार्थ, सजदएताजीमीला सुध्दा, हराम ठरविण्यात आले. आता सजद-ए- ताजीमी पण कोणासाठी ही योग्य नाही. येथपावेतो कीं, डोके वाकवून, कोणाला भेटणे योग्य नाही.

३) म्हणजे ह. यूसुफ عليه السلام नी जे स्वप्न पाहिले होते, इतक्या परीक्षांतून पार पडल्यानंतर, सरशेवटी त्याचे हे भाकित पुढें आले की, अल्लाहतआलाने यूसुफ عليه السلام. ला राज सिंहासनावर बसविले; आणि मातापित्या समवेत तमाम भावांनी त्यांना सजदा केला.

४) अल्लाहच्या उपकारामध्ये, विहीरीतून निघण्याचा उल्लेख केला नाही; कारण की, भावांनी लज्जीत होऊ नये. हे

पैगंबरी चारित्र्य आहे.
५) इजिप्त सारख्या सुमृध्द इलाख्याच्या तुलनेत, कन्आनची स्थिती, एका वाळवंटा सारखी होती; म्हणून त्याला बदवुन ने संबोधित केले.
६) हा पण दयाळू वृत्तीचा एक नमुना आहे. की, भावांना जरा सुध्दा दोष दिला नाही. आणि शैतानाला या कारस्थानाला कारणीभूत ठरविले.
७) म्हणजे इजिप्त देशाची अधिकार सुत्रे प्रदान केली; जसा कीं तपशील येऊन चुकला.
८) ह. यूसुफ عليه السلام. अल्लाहचे पैगंबर होते. ज्यांच्यावर अल्लाहकडून वह्य' उतरत असे; आणि खास खास गोष्टींचे त्यांना ज्ञान दिले जात असे. म्हणून या पैगंबरी ज्ञानाच्या प्रकाशांत, पैगंबरा स्वप्नाचे भाकीतपण करुन घेत असत. स्वप्नांच्या भाकितांचे हे कौशल्य, अल्लाहतआला आतासुध्दा कोणाकोणाला देत असतो. जरी पुष्कळशी स्वप्नांचे भाकीत सांगणारी पुस्तके तयार करण्यात आली आहेत. जशी 'ताबिरूर रूअया' आणि ताबीरूल अनाम फी ताबीरूल मनाम'' सारखी पुस्तके पण आढळून येतात. परंतु त्यांचा काही खास दर्जा नाहीं, खरी गोष्ट, तेच ज्ञान आणि दूर दृष्टी आहे, जे अल्लाहतआला कोणाकोणाला देत असतो.
९) अल्लाहतआलाने ह. यूसुफ عليه السلام. वर जे उपकार केलेत, त्यांना आठवण करून, आणि अल्लाहतआलाच्या दुसऱ्या वैशिष्ट्यांची चर्चा करून, दुआ करीत आहेत की, जेव्हा मला मृत्यु येईल, तेव्हां इस्लामच्या स्थितीत यावा. आणि मला पुण्यवान लोकांबरोबर मिळवून घ्यावे. याच्याने अभिप्रेत ह. यूसुफ عليه السلام. चे वाडवडील, ह इब्राहिम عليه السلام. व ह. इस्हाक عليه السلام. वगैरे आहेत. काही लोकांना या दुआमुळे, ही शंका निर्माण झाली कीं, ह. यूसुफ عليه السلام.नी मृत्यूची दुआ मागितली. वास्तविक ही मृत्यू मागण्या ची दुआ नाही; शेवटच्या वेळेपर्यंत इस्लामवर दृढ जमून राहण्याची दुआ आहे.
१०) म्हणजे यूसुफ बरोबर, जेव्हा त्यांना विहीरीत फेकून आले, किंवा अभिप्रेत ह. याकूब عليه السلام. आहेत. म्हणजे त्यांना हे सांगून कीं, यूसुफला लांडग्याने खाऊन टाकले आहे, आणि हा त्याचा सदरा आहे. जो रक्ताने माखलेला आहे. त्यांच्या बरोबर चालबाजी केली गेली. अल्लाहतआलाने या ठिकाणी सुध्दा, या गोष्टीला नाकारले आहे, की नबी करीम ﷺ ला अदृष्टाचे ज्ञान होते परंतु हे नाकारणे ज्ञानाच्या बाबतीत नाही. कारण की, अल्लाहने वह्यच्या मार्फत आपणास माहीत करून दिले. हे नाकारणे प्रत्यक्ष पाहण्याचा आहे; की त्यावेळी तेथे आपण ﷺ हजर नव्हते. अशाच प्रकारे अशा लोकांशी सुध्दा आपली ﷺ उठबस आणि संबंध राहिलेला नाही, ज्यांच्या कडून तुम्ही ऐकले असावे. हा फक्त अल्लाहतआलाच आहे, ज्याने आपणास या अदृष्य घटनेची खबर दिली आहे. जी या गोष्टीचा पुरावा आहे कीं, आपण ﷺ अल्लाहचे खरे पैगंबर आहेत; आणि अल्लाहतआला कडून आपणावर 'वह्य' अवतरीत होत असते. अल्लाहतआलाने आणखी कित्येक ठिकाणी, अशाच प्रकारे अदृष्टाचे ज्ञान आणि प्रत्यक्ष पाहण्याला नाकारले आहे. उदाहरणार्थ पहावे सू. आले इमरान ७४४ सू. कसस ४५-४६, सू. सॉद ६९-७०
११) म्हणजे अल्लाहतआला आपणास मागील घटना सूचित करीत आहे, कारण की लोकांनी त्यापासून बोध घ्यावा. आणि अल्लाहच्या पैगंबरांचा मार्ग अनुसरून, कायमच्या मुक्तीला पात्र होऊन जावे. परंतु असे असून सुध्दा बहुतेक लोक, ईमान आणणारे नाहीत. कारण कीं ते मागील लोकांच्या गोष्टी तर ऐकतात, पण बोध घेण्यासाठी म्हणून नाही, फक्त मनाला भावण्यासाठी आणि चवीसाठी म्हणून; ते ईमान आणण्यापासून वंचित्च राहतात.
१२) की त्यांना अशी शंका यावी की, हा पैगंबरीचा दावा, फक्त पैसे गोळा करण्याचा बहाणा आहे.
१३) कारण की लोकांनी यापासून हिदायत(मार्गदर्शन) प्राप्त करावे. आणि आपले इहलोक आणि परलोक सुधारून घ्यावे आणि जगातील लोक यांच्याकडून डोळे झाक करावे, आणि त्याच्याने हिदायत प्राप्त करू नये, तर तो लोकांचा दोष आणि त्यांचे दुर्भाग्य आहे. कुरआन तर खरोखरी दुनियावाल्यांसाठी, हिदायत आणि बोध, यासाठीच आलेले आहे.

وَكَأَيِّن مِّنْ آيَةٍ فِي السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ يَمُرُّونَ عَلَيْهَا وَهُمْ عَنْهَا مُعْرِضُونَ ﴿١٠٥﴾

**आणि आकाशात आणि पृथ्वीत बऱ्याच निशाण्या आहेत; ज्यांच्याकडून हे तोंड फिरवून निघून जातात.[१] १०५**

وَمَا يُؤْمِنُ أَكْثَرُهُم بِاللَّهِ إِلَّا وَهُم مُّشْرِكُونَ ﴿١٠٦﴾

**आणि यांच्यातून बहुतेक लोक अल्लाहवर ईमान आणल्यावर सुध्दा, मुशरिकच आहेत.[२] १०६**

أَفَأَمِنُوا أَن تَأْتِيَهُمْ غَاشِيَةٌ مِّنْ عَذَابِ اللَّهِ أَوْ تَأْتِيَهُمُ السَّاعَةُ بَغْتَةً وَهُمْ لَا يَشْعُرُونَ ﴿١٠٧﴾

**काय ते या गोष्टी पासून निर्भय होऊन गेले की, त्यांच्याजवळ अल्लाहच्या शिक्षेमधून कोणी सर्व साधारण शिक्षा येऊन लागावी; किंवा त्यांच्यावर अचानक कयामत येऊन लागावी. आणि ते निव्वळ बेखबरच असावेत. १०७**

قُلْ هَٰذِهِ سَبِيلِي أَدْعُو إِلَى اللَّهِ ۚ عَلَىٰ بَصِيرَةٍ أَنَا وَمَنِ اتَّبَعَنِي ۖ وَسُبْحَانَ اللَّهِ وَمَا أَنَا مِنَ الْمُشْرِكِينَ ﴿١٠٨﴾

**आपण सांगून टाका, माझा मार्ग हाच आहे. मी आणि माझे आज्ञाधारक अल्लाहकडे बोलवित आहेत; पूर्ण विश्वास आणि भरोशानंतर[३] आणि अल्लाह परम पवित्र आहे.[४] आणि मी मुशरिकांमधून नाही. १०८**

وَمَا أَرْسَلْنَا مِن قَبْلِكَ إِلَّا رِجَالًا نُّوحِي إِلَيْهِم مِّنْ أَهْلِ الْقُرَىٰ ۗ أَفَلَمْ يَسِيرُوا فِي الْأَرْضِ فَيَنظُرُوا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الَّذِينَ مِن قَبْلِهِمْ ۗ وَلَدَارُ الْآخِرَةِ خَيْرٌ لِّلَّذِينَ اتَّقَوْا ۗ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿١٠٩﴾

**आणि आपल्यापूर्वी आम्ही जेवढे पैगंबर पाठविले आहेत, ते सर्व शहरात राहणारे पुरूषच होते, ज्यांच्याकडे आम्ही 'वह्य' पाठवित राहिलो.[५] काय जमिनीवर चालून फिरून त्यांनी पाहिले नाही की, त्यांच्या पूर्वीच्या लोकांचा काय परिणाम झाला? खचित्‌च परलोकाचे घर, भिऊन चालणाऱ्यांसाठी फारच उत्तम आहे, तर काय तुम्ही समजत नाहीं. १०९**

حَتَّىٰ إِذَا اسْتَيْأَسَ الرُّسُلُ وَظَنُّوا أَنَّهُمْ قَدْ كُذِبُوا جَاءَهُمْ نَصْرُنَا فَنُجِّيَ مَن نَّشَاءُ ۖ وَلَا يُرَدُّ بَأْسُنَا عَنِ الْقَوْمِ الْمُجْرِمِينَ ﴿١١٠﴾

**येथ पावेतो की, जेव्हा पैगंबर निराश होऊ लागले;[६] आणि ते असा विचार करू लागले, की त्यांना खोटे सांगण्यात आले.[७] लगेचच आमची मदत, त्यांचे जवळ येऊन पोहचली,[८] ज्याला आम्ही इच्छिले, त्याला सुटका देण्यात आली.[९] गोष्ट अशी आहे की, आमची शिक्षा गुन्हेगारांकडून परत केली जात नाही. ११०**

لَقَدْ كَانَ فِي قَصَصِهِمْ عِبْرَةٌ لِّأُولِي الْأَلْبَابِ ۗ مَا كَانَ حَدِيثًا يُفْتَرَىٰ وَلَٰكِن تَصْدِيقَ الَّذِي بَيْنَ يَدَيْهِ وَتَفْصِيلَ كُلِّ شَيْءٍ وَهُدًى وَرَحْمَةً لِّقَوْمٍ يُؤْمِنُونَ ﴿١١١﴾

**यांच्या गोष्टीत खचित्‌च बुध्दीमंतासाठी, उपदेश आणि बोध आहे हे कुरआन, खोटी बनविलेली गोष्ट नाही. किंबहुना हे सत्य ठरवणारे आहे, त्या पुस्तकांना जी याच्या पूर्वीची आहे, स्पष्ट स्पष्ट करून सांगणारे आहे, प्रत्येक गोष्टीला आणि हिदायत (मार्गदर्शन) व रहमत आहे, ईमानवाल्या लोकांसाठी.[१०] १११**

१) आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, आणि त्यांच्यात अन्‌गिनत्‌ वस्तुंचे अस्तित्व, या गोष्टीवर प्रमाण आहे कीं, एक निर्माता आणि कारागीर आहे, ज्याने या वस्तुंना अस्तित्व बहाल केले आहे. आणि एक असा सांभाळकर्ता आहे, जो यांची अशी व्यवस्था करीत आहे की, शेकडो वर्षांपासून ही व्यवस्था चालू आहे; परंतु यांच्यात कधी आपसात टकराव झालेला नाही, परंतु लोक या वस्तुंना नुसतेच पहाता, त्यावर मनन चिंतन करीत नाहीं. आणि न त्यावरून आपल्या पालनकर्त्याची ओळख करून घेतात.

२) हे ते वास्तव आहे ज्याला कुरआनाने, मोठ्या खुलाशासह, अनेक ठिकाणी वर्णन केले आहे. की, हे मुशरिकीन हे तर मान्य करतात की, आकाश आणि पृथ्वीचा निर्माता, मालक, रोजी देणारा, आणि सर्वसंकल्प, फक्त अल्लाहतआलाच आहे. परंतु असे असून सुध्दा, उपासनेत दुसऱ्यांना पण सहभागी करून घेतात; आणि अशाप्रकारे बहुतेक लोक मुशरिक आहेत. म्हणजे प्रत्येक काळात लोक एकेश्वरवाद्दात पालनकर्त्याचे तर मानणारे राहिले आहेत.

परंतु एकेश्वरवादात एका उपास्याला मानणाऱ्याला तयार नसतात. आजच्या कबरपुजकाचे शिर्कपण हेच आहे की ते कबरेत दफन झालेल्या बुजूर्गांना, उपास्य होण्याच्या वैशिष्ट्याला योग्य समजून, त्यांना मदतीसाठी बोलवत सुध्दा असतात. आणि उपासनेचे कित्येक प्रकार, सुध्दा त्यांच्यासाठी पार पाडतात. अ आ जनल्लाह मिनंहु!

३) म्हणजे हा एकेश्वरवादाचा मार्ग, हाच माझा मार्ग आहे; किंबहुना प्रत्येक पैगंबराचा हाच मार्ग राहीला आहे. याचकडे मी आणि माझे अनुयायी, पूर्ण विश्वास आणि शास्त्रीय पुराव्या सह, लोकांना बोलवत आहे.

४) मी त्याचे पावित्र्य वर्णन करतो, या गोष्टीकडून कीं, त्याचा कोणी सहभागी, त्याच्यासारखा, उपमा देण्यासारखा, किंवा त्याचा मंत्री, सल्लागार किंवा संतती आणि पत्नी असावी, तो या सर्व गोष्टींपासून पवित्र आहे.

५) हे महावाक्य या गोष्टीवर 'नस्स' (स्पष्ट) आहे, की सर्व पैगंबर पुरूषच झाले आहेत. स्त्रीयांमधून कोणाला पैगंबरी पद मिळाले नाही.

६) ही निराशा आपल्या लोकांच्या ईमान न आणण्यामुळे झाली.

७) म्हणजे या पैगंबरांच्या मानणाऱ्यांच्या मनात, हीं चलबिचल निर्माण झाली कीं, त्यांच्याशी असाच शिक्षेचा वायदा केला गेला आहे. शिक्षा कदाचित् येणार नाहीं. लक्षात असू द्यावे की, अशी चलबिचल होऊन जाणे, ईमानच्या विरोधात नाही. काहींनी 'जन्नू चा फाईल, लोक म्हणजे काफिरांना ठरवले आहे. म्हणजे काफिर शिक्षेच्या धमकीवर पहिले तर भ्याले; परंतु जेव्हा फार उशीर झाला, तेव्हा विचार केला की, शिक्षा तर आता येत नाही. (जसा की, पैगंबराकडून दावा केला जात आहे.) आणि न येतांना दिसत आहे. असे वाटते कीं पैगंबरांशी सुध्दा, असाच खोटा वायदा केला गेला आहे. अर्थ, नबी करीम ﷺ ची सांत्वना करणे आहे. की, आपल्या लोकांवर शिक्षेत जो विलंब केला जात आहे, याच्याने घाबरण्याची आवश्यकता नाही; मागच्या लोकांत सुध्दा, शिक्षेत मोठमोठे विलंब ठेवण्यात आले आहेत. आणि अल्लाहच्या मर्जी आणि प्रयोजनानुसार, त्यांना खूप खूप सवलत देण्यात आली. येथपर्यंत की पैगंबर आपल्या लोकांच्या ईमान आणण्याकडून, निराश होऊन गेले; आणि लोक असा विचार करू लागले कीं, त्यांना शिक्षे विषयी असेच खोटेनाटे सांगून देण्यात आले आहे.

८) जेव्हा त्यांची निराशा, या भयंकर अंदेशा आणि चलबिचली पर्यंत पोहचून गेली, तेव्हा ताबडतोब आमची मदत, त्यांच्या जवळ येऊन पोहचली; आणि त्यांच्या मनातून शंका कुशंकेची जळमटे निघून गेली. यांच्यात खरे म्हणजे, अल्लाहतआलाच्या या सवलतीच्या कायद्याचे वर्णन आहे. जो तो आज्ञाभंजकांना देत असतो, येथपावेतो की, तो आपल्या पैगंबरांच्या इच्छेच्या विरुद्ध सुद्धा जास्तीत जास्त अवकाश देत असतो, घाई करीत नसतो; येथपर्यंत की, काहींवेळा, पैगंबरांचे मानणारे सुध्दा, शिक्षा येण्याने निराश होऊन, असे समजू लागतात कीं, त्यांच्याशी असाच खोटानाटा वायदा करण्यात आला आहे.

९) हे सुटका मिळवणारे, ईमानवालेच असतात.

१०) म्हणजे हे कुरआन, ज्यात यूसुफची गोष्ट, आणि दुसऱ्या लोकांच्या घटना वर्णन करण्यात आल्या आहेत; काही रचलेले नाही. किंबहूना ते मागील पुस्तकांना सत्य ठरवणारे आहे. आणि यांच्यात धर्मविषयी सर्व बाबींचा उहापोह केलेला आहे; आणि ईमानवाल्यांसाठी हिदायत आणि रहमत.

# (१३) सू. रअद

महावाक्ये ४३ | रुकूअ ६

سُوْرَةُ الرَّعْدِ مَدَنِيَّةٌ (٩٦) (١٣) | اٰيَاتُهَا ٤٣ | رُكُوْعَاتُهَا ٦

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

الٓمّٓرٰ تِلْكَ اٰيٰتُ الْكِتٰبِ ؕ وَالَّذِیْۤ اُنْزِلَ اِلَیْكَ مِنْ رَّبِّكَ الْحَقُّ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا یُؤْمِنُوْنَ ①

**अलीफ-लाम-मीम-रा ही कुरआनाची महावाक्ये आहेत. आणि जे काही आपल्याकडे आपल्या पालनकर्त्या कडून उतारण्यात येते, सर्व सत्य आहे; परंतु बहुतेक लोक ईमान आणित नाहीत. (१)**

اَللّٰهُ الَّذِیْ رَفَعَ السَّمٰوٰتِ بِغَیْرِ عَمَدٍ تَرَوْنَهَا ثُمَّ اسْتَوٰی عَلَی الْعَرْشِ وَ سَخَّرَ الشَّمْسَ وَ الْقَمَرَ ؕ كُلٌّ یَّجْرِیْ لِاَجَلٍ مُّسَمًّی ؕ یُدَبِّرُ الْاَمْرَ یُفَصِّلُ الْاٰیٰتِ لَعَلَّكُمْ بِلِقَآءِ رَبِّكُمْ تُوْقِنُوْنَ ②

**अल्लाह तो आहे,ज्याने आकाशाला स्तंभाशिवाय, उभारून ठेवले आहे, की तुम्ही त्याला पहात आहात. नंतर तो महासिंहासनावर विराजमान झाला.[१] त्यानेच सूर्य आणि चंद्राला आपल्या आधिन करून ठेवले आहे. प्रत्येक एका निश्चित वेळेवर चालला जात आहे.[२] तोच कामाची व्यवस्था करतो; तो आपल्या निशाण्या स्पष्ट करून सांगतो, की तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा विश्वास बाळगावा. (२)**

وَهُوَ الَّذِیْ مَدَّ الْاَرْضَ وَجَعَلَ فِیْهَا رَوَاسِیَ وَ اَنْهٰرًا ؕ وَمِنْ كُلِّ الثَّمَرٰتِ جَعَلَ فِیْهَا زَوْجَیْنِ اثْنَیْنِ یُغْشِی الَّیْلَ النَّهَارَ ؕ اِنَّ فِیْ ذٰلِكَ لَاٰیٰتٍ لِّقَوْمٍ یَّتَفَكَّرُوْنَ ③

**आणि त्यानेच जमीन पसरवून अंथरवून दिली आहे. आणि पर्वत आणि नद्या, निर्माण करून दिल्या आहेत;[३] आणि हिच्यात प्रत्येक प्रकारच्या फळाच्या जोड्या दोन दोन निर्माण करून दिल्यात;[४] तो रात्रीला दिवसा पासून लपवून देतो. खचित्च चिंतन आणि मनन करणाऱ्यांसाठीं, यांच्यात बऱ्याच निशाण्या आहेत. (३)**

१) 'सिंहासनावर विराजमान झाला' चा विषय पूर्वीसुध्दा चर्चिला जाऊन चुकला आहे, की याच्याने अभिप्रेत अल्लाहने सिंहासनावर विराजमांन होणे आहे. हदीसकारांचे हेच मत आहे. ते याचा दुसरा अर्थ करीत नाही. जसे दुसरे काही समूह यात आणि अल्लाहच्या काही वैशिष्टयामध्ये दुसरे दुसरे अर्थ (तावील) करतात. तथापि हदीर्शीवर भाष्य करणारे म्हणतात, त्याची अवस्था वर्णन केली जाऊ शकत नाही. न त्याला कोण्या दुसऱ्या गोष्टीबरोबर उपमा दिली जाऊ शकते. कारण की, ''त्याच्या सारखी कुठलीही वस्तू नाही'' (सू. शूरा-११)

२) याचा एक अर्थ हा आहे की एक निश्चित वेळे पर्यंत म्हणजे कयामत पर्यंत, ते अल्लाहच्या हुकूमाने चालत राहतील. जसे की, फर्माविले, ''आणि सूर्य आपल्या थांबण्यांच्या वेळेपर्यंत, चालत आहे.'' (सू.यासीन-३८) दुसरा अर्थ हा आहे कीं, चंद्र आणि सूर्य दोघे आपआपल्या कक्षेत पोहंत पडले आहे. सूर्य आपले चालणे, एका वर्षात, आणि चंद्र एका महिन्यांत पूर्ण करून घेतो. ज्याप्रमाणे फर्माविले, ''आम्ही चंद्राच्या कला निश्चित केल्या आहेत.'' (सू.यासीन -३९) येथे फक्त सुर्य व चंद्र या दोघांचा उल्लेख केला आहे, कारण कीं हेच दोन, दुनियेसाठी जास्त महत्त्वाचे आहेत. जेव्हा हे दोघे सुध्दा अल्लाह्च्या हुकूमाचे ताबेदार आहेत,तर दुसरे ग्रह, चांगल्या प्रकारे, त्याच्या आधीन आहेत. आणि जेव्हा हे अल्लाह्च्या हुकूमाच्या आधीन आहेत, तर ते उपास्य होऊ शकत नाही. उपास्य तर तोच आहे, ज्याने यांना अंकित केले आहे. म्हणून फर्माविले, ''सूर्य आणि चंद्राला सजदा करू नका, त्या अल्लाहला सज्दा करा, ज्याने त्यांना निर्माण केले, जर तुम्ही फक्त त्याचीच उपासना करू इच्छित असाल'' (हा-मीम- सज्दः-३७) ''सूर्य,चंद्र आणि तारे, सर्व त्याच्याच हुकूमाच्या अधीन आहेत.''(सू.आअ्राफ ५४)

३) पृथ्वीच्या लांबी रूंदीचा अंदाज पण, सामान्य माणसांना, कठीण आहे. आणि उंच पर्वतांनी जणू, जमिनीत मेखा ठोकून दिल्या आहेत. पाट, नद्या, आणि झऱ्यांचा, असा क्रम चालू करून दिला आहे. ज्याच्याने मनुष्य स्वत:पण तृप्त होतो आणि आपल्या शेतांना पण पाणी पाजतो, ज्याच्याने तऱ्हे तऱ्हेचे धान्य,फळफळावळ, निर्माण होते; ज्यांची रूपें पण, एक दुसऱ्या पासून भिन्न आहेत; आणि चवीसुध्दां, वेगवेगळ्या असतात.

४) याचा ,एक अर्थ तर हा आहे. की, नर आणि मादी, दोन्ही बनविले; जसे की, आधुनिक शोधांनी सुध्दा, याला मान्यता दिली आहे. दुसरा अर्थ (जोड्या जोड्यांचा) हा आहे की, गोड आणि आंबट, थंड आणि उष्ण, काळे आणि पांढरे, आणि चवीष्ट आणि बेचव; अशाप्रकारे एक दुसऱ्यापासून वेगळे, आणि एक दुसऱ्याचे उलट प्रकार निर्माण केलेत.

وَفِي الْأَرْضِ قِطَعٌ مُّتَجٰوِرٰتٌ وَّجَنّٰتٌ مِّنْ أَعْنَابٍ وَّزَرْعٌ وَّنَخِيلٌ صِنْوَانٌ وَّغَيْرُ صِنْوَانٍ يُّسْقٰى بِمَآءٍ وّٰحِدٍ وَنُفَضِّلُ بَعْضَهَا عَلٰى بَعْضٍ فِي الْأُكُلِ إِنَّ فِي ذٰلِكَ لَأٰيٰتٍ لِّقَوْمٍ يَّعْقِلُونَ ﴿٤﴾

आणि पृथ्वीत एक दुसऱ्याला लागून अनेक प्रदेश आहेत;[१] आणि द्राक्षांच्या बागा आहेत; आणि शेते आहेत. आणि खजुरीचे वृक्ष आहेत. फांद्यांवाले, आणि काही असे[२] आहेत, जे बिनफादयांचे आहेत; सर्वांना एकाच प्रकारचे पाणी पाजले जाते, तरी सुध्दा आम्ही फळात, एक दुसऱ्याला वर्चस्व [३] दिले आहे; यांच्यात बुध्दीमंतासाठी बऱ्याच निशाण्या आहेत. ④

وَإِنْ تَعْجَبْ فَعَجَبٌ قَوْلُهُمْ ءَإِذَا كُنَّا تُرٰبًا ءَإِنَّا لَفِي خَلْقٍ جَدِيدٍ أُولٰٓئِكَ الَّذِينَ كَفَرُوا بِرَبِّهِمْ وَأُولٰٓئِكَ الْأَغْلٰلُ فِي أَعْنَاقِهِمْ وَأُولٰٓئِكَ أَصْحٰبُ النَّارِ هُمْ فِيهَا خٰلِدُونَ ﴿٥﴾

जर तुला आश्चर्य वाटत असेल तर खरोखर यांचे हे म्हणणे विचित्र आहे की, काय जेव्हा आम्ही माती होऊन जाऊ, तर काय आम्ही नव्याने जन्मास येणार आहोत? [४] हेच ते लोक आहेत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याला नाकारले. हेच आहेत. ज्यांच्या गळ्यात मानखोडे पडलेले असतील.आणी हेच आहेत जे नेहमी नरकाग्नीत राहतील,जे हिच्यात निरंतर राहतील. ⑤

وَيَسْتَعْجِلُونَكَ بِالسَّيِّئَةِ قَبْلَ الْحَسَنَةِ وَقَدْ خَلَتْ مِنْ قَبْلِهِمُ الْمَثُلٰتُ وَإِنَّ رَبَّكَ لَذُو مَغْفِرَةٍ لِّلنَّاسِ عَلٰى ظُلْمِهِمْ وَإِنَّ رَبَّكَ لَشَدِيدُ الْعِقَابِ ﴿٦﴾

आणि जे तुझ्याकडे (शिक्षेच्या मागणीत) घाई करीत आहेत, सुख आरामापूर्वीच; खचित्च यांच्यापूर्वी शिक्षा, म्हणी सारख्या, येऊन चुकल्या आहेत.[५] आणि नि:संशय तुझा पालनकर्ता, लोकांच्या खोडसळपणाला[६] क्षमाकर्ता आहे. आणि ही गोष्ट पण नक्कीच आहे की, तुझा पालनकर्ता फार कडक शिक्षा देणारा पण आहे. [७] ⑥

وَيَقُولُ الَّذِينَ كَفَرُوا لَوْلَآ أُنْزِلَ عَلَيْهِ أٰيَةٌ مِّنْ رَّبِّهِ إِنَّمَآ أَنْتَ مُنْذِرٌ وَّلِكُلِّ قَوْمٍ هَادٍ ﴿٧﴾

आणि काफिर म्हणतात की, यांच्यावर याच्या पालनकर्त्या कडून कोणी निशाणी (चमत्कार) का म्हणून, उतारण्यात आला नाही? गोष्ट हीआहे की आपण (सल्ल) तर फक्त सावध[८] करणारे आहेत. प्रत्येक कौम(समूह)साठी ( एक ना एक) मार्गदर्शक (झालेला) आहे. [९] ⑦

اللّٰهُ يَعْلَمُ مَا تَحْمِلُ كُلُّ أُنْثٰى وَمَا تَغِيضُ الْأَرْحَامُ وَمَا تَزْدَادُ وَكُلُّ شَيْءٍ عِنْدَهُ بِمِقْدَارٍ ﴿٨﴾

प्रत्येक मादी आपल्या गर्भात जे काही बाळगते, त्याला अल्लाहतआला फार चांगल्या प्रकारे जाणतो;[१०] आणि गर्भाचे वाढणे घटने पण [११] आणि प्रत्येक गोष्टींचा अंदाज त्याचेजवळ निश्चित आहे.[१२] ⑧

عٰلِمُ الْغَيْبِ وَالشَّهَادَةِ الْكَبِيرُ الْمُتَعَالِ ﴿٩﴾

दृष्ट व अदृष्टाचा तो ज्ञाता आहे, सर्वांत थोर आणि (सर्वात) महिमाशाली ⑨

سَوَآءٌ مِّنْكُمْ مَّنْ أَسَرَّ الْقَوْلَ وَمَنْ جَهَرَ بِهِ وَمَنْ هُوَ مُسْتَخْفٍ بِالَّيْلِ وَسَارِبٌ بِالنَّهَارِ ﴿١٠﴾

तुमच्यातून आपल्या कोणाच्या गोष्टीला लपवून सांगणे आणि मोठया आवाजाने सांगणे आणि जे रात्रीच्या (अंधकारात)लपलेले असेल आणि जे दिवसात चालत असेल, अल्लाहवर हे सर्व बरोबर आणि एक समान आहेत. ⑩

१) 'मुतजाविरात' एक दुसऱ्याच्या जवळ आणि मिळालेली म्हणजे जमिनीचा एक भाग, पाणी युक्त आणि सुपीक आहे. खूप उत्पन्न देतो. यांच्या बरोबरच नापीक जमीन आहे, जिच्यात कुठल्याही प्रकारचे उत्पन्न निघत नाही.

२) 'सिनवान' चा एक अर्थ आहे, एक दुसऱ्यांशी मिळते जुळते, आणि 'गैरसिनवानचे वेगवेगळे, केला गेला आहे. दुसरा अर्थ, 'सिनवान' एक वृक्ष, ज्याला अनेक फांद्या,आणि खोडे असावेत; जसे डाळींब, अंजीर, आणि खजुरी आहेत. आणि 'गैर सिनवान' जो अशाप्रकारे नसावा, किंबहुना एकाच खोडावाला असावा.

३) म्हणजे जमीन पण एक. पाणी हवा पण एक, परंतु फळे आणि धान्य वेगवेगळ्या प्रकारचे आणि त्यांच्या चवी आणि रूपे, वेगवेगळ्या प्रकारचे.

४) म्हणजे ज्या व्यक्ती विशेष ने पहिल्यादा निर्माण केले, त्याच्यासाठी दुसऱ्यादा त्या वस्तुंचे बनविणे, काही कठीण काम नाहीं. परंतु हे काफिर याला विचित्र गोष्ट म्हणतात की, दुसऱ्यादा आम्ही कसे निर्माण केले जाऊ?

५) म्हणजे अल्लाहच्या शिक्षेने राष्ट्रे, आणि वस्त्या, नष्ट करण्यात आल्या उदाहरणे पहिले येऊन चुकले आहेत. तरी सुध्दा शिक्षेत हे घाई करतात? हे काफिरांच्या उत्तरात सांगण्यात आले, जे म्हणत असत, हे पैगंबरा! जर तू खरा आहेस, तर ती शिक्षा आमच्यावर घेऊन ये! ज्यापासून तू आम्हास भिववीत आहेस.

६) म्हणजे लोकांच्या जुलूम आणि अत्याचार असून सुध्दा, तो शिक्षेत घाई करीत नाही; आणि काही वेळा इतका उशीर करतो की, प्रकरण कयामत पर्यंत सोडून देतो. हा त्याच्या कनवाळूपणाचा, कृपेचा आणि क्षमेचा व डोळे झांक करण्याचा परिणाम आहे. नाहीतर तो लगेचच पकड करण्यावर आणि शिक्षां देण्यावर येऊन जाईल तर, जमिनीच्या पृष्ठभागावर कोणी मनुष्य शिल्लक राहणार नाही. ''आणि जर अल्लाहतआला लोकांना त्यांच्या कर्मांमुळे धरपकड करू लागता, तर जमिनीच्या पृष्ठभागावर एकाही जीवाला बाकी सोडले नसते.(सू.फातिर-४५)

७) हे अल्लाहच्या दुसऱ्या वैशिष्ट्याचे वर्णन आहे. कारण कीं मनुष्याने फक्त एकाच बाजूवर लक्ष न ठेवावे; त्याच्या दुसऱ्या बाजूला पण पहात रहावे. कारण की एकाच दिशेला आणि एकच बाजूला सतत पाहत राहिल्याने, पुष्कळशा गोष्टी लक्षात येत नाहीं. म्हणून कुरआन करीम मध्ये जेथे जेथे दया आणि क्षमेच्या वैशिष्ट्याचा उल्लेख असतो तेथे, त्याचे दुसरे वैशिष्टये, जबरदस्त व सक्ती करणारा, यांचा पण उल्लेख आढळून येतो; जसे कीं याठिकाणी सुध्दा आहे. कारण कीं, आशा आणि भीती, दोन्ही बाजू समोर रहाव्यात,कारण की फक्त आशाच आशा पुढे राहिली, तर मनुष्य अल्लाहच्या समक्ष, गुन्हे करण्यावर धीट होऊन जातो. आणि जर भयच भय, अंत:करण आणि डोक्यावर स्वार असेल, तर अल्लाहच्या दयेकडून निराशा होऊन जाते; आणि या दोन्हीही गोष्टी चूक, आणि मनुष्याकरता बर्बाद करणाऱ्या आहेत. याचसाठी म्हटले जाते, ''ईमान, भय आणि आशा, दोहोंच्या दर्म्यान आहे.'' म्हणजे दोन्ही गोष्टींच्या बाबतीत संतुलन आणि बरोबरीचे नाव ईमान आहे. मनुष्य अल्लाहच्या शिक्षेच्या भयाने बेपर्वा असावा, न त्याच्या दयेकडून निराश.या विषयाला आणखी समजण्याकरिता पहावे, सू. अन्आम -४७, सू. आअराफ- १६७, सू. हिज्र ४९,५० वगैरे महावाक्ये.

८) प्रत्येक पैगंबराला अल्लाहतआलाने परिस्थिती, आवश्यकता, आणि आपली मर्जी आणि प्रयोजन, यांच्या प्रमाणे काही निशाण्या आणि चमत्कार प्रदान केलेत. परंतु काफिर आपल्या मन्शेप्रमाणे, चमत्कारांची मागणी करीत राहिले आहेत. जसे मक्केचे काफिर नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला म्हणत, ''सफा पर्वताला सोन्याचा बनवून दिला जावा. किंवा डोंगरांच्या जागी, पाट आणि झरे, वाहवून द्यावे, वगैरे, वगैरे,जेव्हा यांच्या इच्छे पम्राणे, चमत्कार सादर करून न दाखविला जाई, तर म्हणत, याच्यावर कोणी निशाणी (चमत्कार) का उतारण्यात आली नाही? अल्लाहतआलाने फर्माविले, हे पैगंबरा! तुझे काम फक्त, भीती दाखविणे आणि प्रचार करणे आहे. ते तू करीत रहा, कोणी मानो अथवा न मानो; याची तुला काही गरज नाही. यासाठी कीं हिदायत देणे, हे आमचे काम आहे. तुझे काम मार्ग दाखविणे आहे. या मार्गावर चालवून देणे हे तुझे नाही, आमचे काम आहे.

९) म्हणजे प्रत्येक कौमच्या हिदायत आणि मार्गदर्शनासाठी, अल्लाहतआलाने मार्गदर्शक जरूर पाठविला आहे. ही वेगळी गोष्ट आहे कीं कौमने हिदायतचा मार्ग आत्मसात केला किंवा नाही. परंतु सरळमार्ग दाखविण्या करिता, प्रत्येक कौममध्ये पैगंबर जरूर आला. ''प्रत्येक उम्मत मध्ये, एक भीती दाखवणारा अवश्य आलेला आहे.''(सू.फातिर-२४)

१०) आईच्या गर्भाशयात काय आहे? सौंदर्यवान आहे की, कुरूप, पुण्यवान आहे का पापी, दीर्घ वयाचा आहे की, लहान वयाचा? या सर्व गोष्टी फक्त अल्लाहतआलाच जाणतो.

११) याच्याने अभिप्रेत गर्भाची मुदत आहे. जी सर्व साधारण तर ९ महिने असते, परंतु कमी जास्त पण होत असते. कोण्या वेळी ही मुदत १० महिने, आणि कोण्या वेळी, ७-८ महीने होऊन जाते. याचे ज्ञान पण अल्लाहच्या शिवाय कोणाला नाही.

१२) म्हणजे कोणाचे जीवन किती आहे? त्याला उपजिवीकेतून किती वाटा मिळेल? याचे पूर्ण ज्ञान अल्लाहतआलाला आहे.

لَهٗ مُعَقِّبٰتٌ مِّنْۢ بَيْنِ يَدَيْهِ وَمِنْ خَلْفِهٖ يَحْفَظُوْنَهٗ مِنْ اَمْرِ اللّٰهِ ۭ اِنَّ اللّٰهَ لَا يُغَيِّرُ مَا بِقَوْمٍ حَتّٰى يُغَيِّرُوْا مَا بِاَنْفُسِهِمْ ۭ وَاِذَآ اَرَادَ اللّٰهُ بِقَوْمٍ سُوْۗءًا فَلَا مَرَدَّ لَهٗ ۚ وَمَا لَهُمْ مِّنْ دُوْنِهٖ مِنْ وَّالٍ ﴿١١﴾

त्याचे पहारेकरी,[1] माणसाच्या मागे पुढे तैनात केलेले आहेत; जे अल्लाहच्या हुकूमाने त्याचे संरक्षण करतात.कोण्या समाजाची स्थिती अल्लाहतआला बदलत नाही. जो पर्यंत की, तो स्वत: तिला बदलणार नाहीं, जे त्यांच्या मनांत [2] आहे; अल्लाहतआला जेव्हा कधी कोण्या लोकांना शिक्षा (देण्याचा) इरादा करून घेतो, तर तो त्याला बदलत नसतो. आणि त्याच्या शिवाय त्यांचा कोणीही कार्यसाधक नाही ११

هُوَ الَّذِيْ يُرِيْكُمُ الْبَرْقَ خَوْفًا وَّطَمَعًا وَّيُنْشِئُ السَّحَابَ الثِّقَالَ ﴿١٢﴾

तो अल्लाहच आहे, जो तुम्हास विजेची चमक, भिवविण्यासाठी आणि आशा लावून देण्यासाठी, दाखवत असतो.[3] आणि भारी भारी ढग उभारत असतो.[4] १२

وَيُسَبِّحُ الرَّعْدُ بِحَمْدِهٖ وَالْمَلٰۗىِٕكَةُ مِنْ خِيْفَتِهٖ ۚ وَيُرْسِلُ الصَّوَاعِقَ فَيُصِيْبُ بِهَا مَنْ يَّشَاۗءُ وَهُمْ يُجَادِلُوْنَ فِي اللّٰهِ ۚ وَهُوَ شَدِيْدُ الْمِحَالِ ﴿١٣﴾

आणि (ढगांची) गर्जना, त्याचे पावित्र्य व स्तुती करते, आणि देवदूत सुध्दा, त्याच्या भयाने.[5] तोच आकाशांतून वीजा पाडतो; आणि ज्याच्यावर इच्छितो, त्याच्यावर टाकतो;[6] काफिर अल्लाहच्या बाबतीत झगडत आहेत. आणि अल्लाह् फारच सामर्थ्यवाला [7] आहे. १३

لَهٗ دَعْوَةُ الْحَقِّ ۭ وَالَّذِيْنَ يَدْعُوْنَ مِنْ دُوْنِهٖ لَا يَسْتَجِيْبُوْنَ لَهُمْ بِشَيْءٍ اِلَّا كَبَاسِطِ كَفَّيْهِ اِلَى الْمَاۗءِ لِيَبْلُغَ فَاهُ وَمَا هُوَ بِبَالِغِهٖ ۭ وَمَا دُعَاۗءُ الْكٰفِرِيْنَ اِلَّا فِيْ ضَلٰلٍ ﴿١٤﴾

त्याचाच धावा करणे सत्य आहे.[8] जे लोक, दुसऱ्यांना त्याच्याशिवाय बोलावित असतात. ते त्यांच्या कोण्या पुकारण्यावर काहीच उत्तर देत नाही; जसे कोण्या मनुष्याने आपले दोन्ही हात पाण्याकडे फैलावले असावे, की त्याच्या तोडात पडून जावे, वास्तविक ते पाणी त्याच्या तोंडात पोहोचणार नाही.[9] या काफिरांचे जेवढे पुकारणे आहे, ते असेच भटक्या मारीत फिरते.[10] १४

१) 'मुअक्किबात' 'मुअक्किबतुन' चे अनेकवचन आहे. एक दुसऱ्याच्या मागून येणारे, अभिप्रेत देवदूत आहेत, जे क्रमाक्रमाने एक दुसऱ्याच्या नंतर येतात. दिवसाचे देवदूत जातात, तेव्हा रात्रीचे देवदूत येतात; रात्रीचे जातात, तेव्हा, दिवसाचे येतात.

२) याच्या खुलाशासाठी पहावे सू. अन्फाल आ.क्र ५३चा समास

३) ज्याच्याने रस्त्याने जाणारे प्रवासी भितात, आणि घरात असलेले शेतकरी, याच्यापासून बरकत आणि नफ्याची आशा बाळगतात.

४) भारी ढगांनी अभिप्रेत ते ढग आहेत, ज्यांच्यात पावसाचे पाणी असते.

५) जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''प्रत्येक वस्तु अल्लाह्ची स्तुती आणि पावित्र्य वर्णन करते.'' (सू.बनी इसराईल -४४)

६) म्हणजे त्याच्यामार्फत, ज्याला इच्छितो, त्याला नष्ट करून टाकतो.

७) 'मिहाल' चा अर्थ सामर्थ्य, पकड आणि युक्ती वगैरेचा केला गेला आहे. म्हणजे तो मोठा सामर्थ्यवान, सक्त पकड आणि युक्ती करणारा आहे.

८) म्हणजे भय आणि आशेच्या वेळीं, त्याच एका अल्लाहचा धावा करणे, बरोबर आहे; कारण की, तोच प्रत्येकाचे बोलणे ऐकतो आणि मान्य करतो. किंवा आवाहन, उपासनेच्या अर्थात आहे. म्हणजे त्याची उपासना करणे सत्य आणि बरोबर आहे. आणि त्याच्याशिवाय अन्य कोणी उपासनेला पात्र नाही. कारण की, ब्रम्हांडाचा सृष्टीकर्ता, मालक आणि व्यवस्थापक फक्त तोच आहे. म्हणून उपासना हा पण त्याचाच हक्क आहे.

९) म्हणजे जे अल्लाह्ला सोडून, दुसऱ्याला मदतीसाठी बोलवित असतात, त्यांचे उदाहरण असे आहे, जसे कोणी मनुष्य दुरून पाण्याकडे, आपले दोन्ही तळहात पसरून, पाण्याला म्हणेल कीं, तू माझ्या तोंडापर्यंत येऊन जा; उघड गोष्ट आहे कीं, पाणी अचल वस्तू आहे, त्याला या गोष्टीचा पत्ताच नाही, की तळहात पसरणाऱ्याची इच्छा काय आहे? तसेच त्याला याचीही जाणीव नाहीं की तो मला तोंडापर्यंत पोहोचण्याची मागणी करीत आहे. तसेच त्याच्यात हे सामर्थ्यपण नाहीं, आपल्या ठाई हालचाल करून, त्याच्या हात किंवा तोंडापर्यंत पोहचून जावे. अशाच प्रकारे हे मुशरिक अल्लाह्शिवाय ज्यांना साद घालतात, त्यांना या गोष्टीची जाणीव नाहीं कीं, कोणी त्यांना बोलवित आहे; आणि त्याची अमुक इच्छा आहे. तसेच त्यांच्यात या इच्छापूर्तीचे काही सामर्थ्य नाही.

१०) आणि फायदेकारक पण नाही. कारण की, यापासून त्यांना काही फायदा पण होणार नाही.

وَلِلّٰهِ يَسْجُدُ مَنْ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ طَوْعًا وَّكَرْهًا وَّظِلٰلُهُمْ بِالْغُدُوِّ وَ الْاٰصَالِ ﴿١٥﴾

आणि आकाश आणि पृथ्वीवरील सर्व सृष्टी,खुशीने अथवा नाखुशीने अल्लाहलाच सजदा करीत आहे.आणि सकाळ संध्याकाळ त्यांच्या सावल्या सुध्दा.(१) ⑮

قُلْ مَنْ رَّبُّ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ قُلِ اللّٰهُ ؕ قُلْ اَفَاتَّخَذْتُمْ مِّنْ دُوْنِهٖۤ اَوْلِيَآءَ لَا يَمْلِكُوْنَ لِاَنْفُسِهِمْ نَفْعًا وَّلَا ضَرًّا ؕ قُلْ هَلْ يَسْتَوِي الْاَعْمٰى وَالْبَصِيْرُ ۙ اَمْ هَلْ تَسْتَوِي الظُّلُمٰتُ وَ النُّوْرُ ۚ اَمْ جَعَلُوْا لِلّٰهِ شُرَكَآءَ خَلَقُوْا كَخَلْقِهٖ فَتَشَابَهَ الْخَلْقُ عَلَيْهِمْ ؕ قُلِ اللّٰهُ خَالِقُ كُلِّ شَيْءٍ وَّهُوَ الْوَاحِدُ الْقَهَّارُ ﴿١٦﴾

आपण विचारा की आकाश आणि पृथ्वीचा पालनकर्ता कोण आहे? (आपणच) सांगून टाका, अल्लाह! (२) सांगून टाका की काय तुम्ही तरी सुध्दा, त्यांच्या शिवाय दुसऱ्यांना पुरस्कर्ते बनविता आहात. जे स्वत: आपल्या जीवाचा सुध्दा, बऱ्या वाईटाचा अधिकार बाळगत नाहीत.(३) आपण विचारा की, काय आंधळा आणि डोळस बरोबर होऊ शकतात? किंवा काय अंध:कार आणि प्रकाश बरोबर होऊ शकतात?(४) काय ज्यांना हे अल्लाह्चे सरकतदार बनवीत आहेत, त्यांनीही अल्लाह्प्रमाणे सृष्टी निर्माण केली आहे की आता त्यांच्या नजरेत निर्मितीचा आभास होऊन गेला असावा? आपण सांगून टाका कीं, फक्त अल्लाह्च सर्व वस्तूंचा सृष्टीकर्ता आहे; आणि तो एकटाच महाप्रबळ आहे.(५) ⑯

اَنْزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً فَسَالَتْ اَوْدِيَةٌۢ بِقَدَرِهَا فَاحْتَمَلَ السَّيْلُ زَبَدًا رَّابِيًا ؕ وَمِمَّا يُوْقِدُوْنَ عَلَيْهِ فِي النَّارِ ابْتِغَآءَ حِلْيَةٍ اَوْ مَتَاعٍ زَبَدٌ مِّثْلُهٗ ؕ كَذٰلِكَ يَضْرِبُ اللّٰهُ الْحَقَّ وَالْبَاطِلَ ؕ فَاَمَّا الزَّبَدُ فَيَذْهَبُ جُفَآءً ۚ وَاَمَّا مَا يَنْفَعُ النَّاسَ فَيَمْكُثُ فِي الْاَرْضِ ؕ كَذٰلِكَ يَضْرِبُ اللّٰهُ الْاَمْثَالَ ﴿١٧﴾

त्यानेच आकाशांतून पाणी वर्षविले, मग आपआपल्या विस्ताराने ओढे (६) वाहू लागले. मग पाण्याच्या पुराने, वर आलेल्या फेसाला (वर) उचलून घेतले;(७) आणि त्या वस्तुत सुध्दा, जिला अग्नीत टाकून तापवले जाते, दागदागिने आणि साज व सामानासाठी, अशाच प्रकारे फेस आहे.(८) अशाच प्रकारे अल्लाह्तआला सत्य आणि असत्याचे उदाहरण वर्णन करीतो.(९) आता फेस तर फुकटावारीच जातो.(१०) परंतु जी लोकांना नफा देणारी वस्तू आहे, ती जमिनीत तुंबून राहते.(११) अल्लाह्तआला अशाच प्रकारे उदाहरणे सांगत असतो.(१२) ⑰

لِلَّذِيْنَ اسْتَجَابُوْا لِرَبِّهِمُ الْحُسْنٰى ؕ وَالَّذِيْنَ لَمْ يَسْتَجِيْبُوْا لَهٗ لَوْ اَنَّ لَهُمْ مَّا فِي الْاَرْضِ جَمِيْعًا وَّمِثْلَهٗ مَعَهٗ لَافْتَدَوْا بِهٖ ؕ اُولٰٓئِكَ لَهُمْ سُوْٓءُ الْحِسَابِ ۙ وَمَاْوٰىهُمْ جَهَنَّمُ ؕ وَبِئْسَ الْمِهَادُ ﴿١٨﴾

ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याचे आज्ञापालन केले, त्यांच्यासाठी कल्याणच कल्याण आहे. आणि ज्या लोकांनी आज्ञेचे पालन केले नाही, जर त्यांच्यासाठी, जमिनीत जे काही आहे, सर्व काही (त्यांच्याच साठी) असो; आणि त्याचे बरोबर तसेच आणखीही असो तर ते सर्व काही, आपल्या (जीवाच्या) बदल्यात देऊन टाकतील;(१३) (तरीही त्यांची सुटका होणार नाही) हेच (लोक) आहेत, ज्यांच्यासाठी कडक हिशेब घेणे (१४) आहे; आणि त्यांचे ठिकाण नगकाग्नी आहे, जी फारच वाईट जागा आहे. ⑱

१) याच्यात अल्लाह्तआलाची महत्ता आणि सामर्थ्याचे वर्णन आहे, की प्रत्येक वस्तूंवर त्याचे वर्चस्व आहे. आणि प्रत्येक वस्तू त्याच्या अधिन आणि त्याच्या समोर सजदा करणारी आहे. मग पाहिजे तर ईमानवाल्या प्रमाणे खुशीने करो, किंवा मुशरिकांप्रमाणे नाखुशीने; आणि त्यांच्या सावल्या पण सकाळ संध्याकाळ, सजदा करतात. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''काय त्यांनी पाहिले नाही की, अल्लाहने जी वस्तूंपण निर्माण केली आहे, त्यांच्या सावल्या, उजवीकडून आणि डावीकडून, अल्लाहला सजदा करीत ढळतात. आणि ते नम्रता दाखवितात.'' (सू.नहल -४८) या सजदयाची वस्तुस्थिती काय आहे? हे अल्लाह्तआला बेहतर जाणतो. किंवा दुसरा भावार्थ याचा हा आहे, कीं काफिरांसह सर्व सृष्टी, अल्लाह्च्या हुकूमाच्या अधीन आहे. कोणात याच्या हुकूमाचे उल्लंघन करण्याची हिंमत नाहीं. अल्लाह्तआला कोणाला आरोग्य देईल, कोणाला आजारी पाडेल, श्रीमंत करून देईल किंवा कंगाल करून टाकेन, जीवन देईल किंवा मृत्युशीं गांठ घालून देईल, या अल्लाह्प्रदत्त अधिकारात कोण्या काफिराला ही हिंमत नाही की त्याने त्यांचा इन्कार करावा.

२) येथे तर पैगंबराच्या मुखाने मान्यता आहे. परंतु कुरआनाच्या दुसऱ्या ठिकाणांच्या उल्लेखांनी स्पष्ट आहे की

मुशरिकांचे सुध्दा हेच उत्तर असे.

३) म्हणजे जेव्हा तुम्ही कबुल आणि मान्य करतात, की आकाश आणि पृथ्वीचा पालनकर्ता अल्लाह् आहे, जो सर्व अधिकारांचा, दुसऱ्याच्या सहभागाशिवाय, मालक आहे; तर मग तुम्ही त्याला सोडून, अशांना का म्हणून आपला मित्र आणि पुरस्कर्ता समजतात, जे आपल्या स्वत:च्या बाबतीत सुध्दा नफ्या नुकसानचा अधिकार बाळगत नाही.

४) म्हणजे ज्याप्रमाणे आंधळा आणि डोळस बरोबर होऊ शकत नाही, अशाच प्रकारे एकेश्वरवादी आणि बहुदेववादी बरोबर होऊ शकत नाही.यासाठी की एकेश्वरवादाचे अंत:करण एकेश्वरवादाने ओतप्रोत असते. जेव्हा मुशरिक (बहुदेव वादी) यापासून वंचित असतो. एकेश्वरवाद्याला डोळे आहेत, ज्याने तो एकेश्वरवादाचा प्रकाश पाहतो. आणि मुशरिकाला हा एकेश्वरवादाचा प्रकाश दिसत नाही, म्हणून तो आंधळा आहे. अशाच प्रकारे ज्याप्रमाणे अंध:कार आणि प्रकाश, बरोबर होऊ शकत नाही, एक अल्लाह्चा भक्त, ज्याचे अंत:करण प्रकाशमय झाले आहे. आणि एक मुशरिक जो अज्ञानात आणि खुळचट कल्पनांत भटकत आहे, बरोबर होऊ शकत नाही.

५) म्हणजे अशी गोष्ट नाही की, हे कोण्या संशयाला बळी पडले असतील, किंबहुना हे मानतात की, प्रत्येक वस्तुंचा सृष्टीकर्ता, फक्त आणि फक्त, अल्लाह्च आहे.

६) बिकदरिहा (विस्ताराप्रमाणे) चा अर्थ आहे ओढे म्हणजे खोरे, (दोन डोंगरातील जागा) अरूंद असेल तर कमी पाणी, रूंद असेल तर जास्त पाणी सामावून घेते. म्हणजे कुरआनाच्या अवतरणाला, जो हिदायत आणि वर्णन करण्याचे जे स्वरूप आहे, पावसाच्या अवतरण्याने उपमा दिली आहे. यासाठी कुरआनाचा नफा पण, पावसाच्या नफ्यासारखा सार्वत्रिक आहे. आणि खोऱ्याची उपमा अंत:करणाच्या बरोबर दिली आहे. यासाठी की खोऱ्यात (ओढ्यात) पाणी जाऊन सांचते; ज्या प्रमाणे कुरआन आणि ईमान, विश्वासुंच्या मनांत घर करते.

७) या फेसाने, जो पाण्याच्या वर येतो, आणि जो फारच कमजोर होवून जातो, आणि वारा त्याला उडवून नेतो, याच्याने 'कुफ्र' अभिप्रेत आहे, जे फेसाप्रमाणेच उडून जाणारे, आणि संपून जाणारे आहे.

८) हे दुसरे उदाहरण आहे की, तांबे, पितळ, शीसे, किंवा सोन्या चांदीला, दागिने किंवा सामान वगैरे बनविण्यासाठी, अग्नीत तापविले जाते, तेव्हा त्याच्यावर पण फेस येऊन जातो. या फेसाने अभिप्रेत मळ- कचरा आहे, जो या धातुंच्या आत असतो. आगीत तापविल्यानंतर, तो फेसाच्या रुपात वर येऊन जातो. मग हा फेस पण पाहता पाहता नष्ट होऊन जातो. आणि धातू मूळ स्वरुपात, शिल्लक राहून जातो.

९) म्हणजे जेव्हा सत्य आणि असत्याचे आपसात जमा होणे आणि टकराव होतो, तर असत्याला अशा प्रकारे, अस्तित्व आणि स्थैर्य नसते, ज्याप्रमाणे पुराच्या पाण्याचा फेस, पाण्याच्या बरोबर, धातूंचा फेस, ज्यांना धातूत तापविले जाते. धातूंच्या बरोबर बाकी राहत नाही. किंबहुना दुर्बल होऊन संपून जातो.

१०) म्हणजे याच्याने काही फायदा होत नाही. कारण की फेस, पाणी किंवा धातूंबरोबर बाकी राहतच नाही. किंबहुना हळू हळू बसून जातो. किंवा वारा त्यांना उडवून नेतो. असत्याचे उदाहरण पण, फेसाप्रमाणेच आहेत.

११) म्हणजे पाणी, आणि सोने, चांदी, तांबे, पितळ वगैरे, हे बाकी राहतात ज्याच्याने लोक, फायदा उचलतात. याचप्रमाणे सत्य बाकी राहते, ज्यांच्या अस्तित्वाला पण ऱ्हास नाही. आणि ज्याचा नफा पण कायमस्वरूपी आहे.

१२) म्हणजे गोष्टीला समजाविण्यासाठी, आणि डोक्यात उतारण्यासाठी, उदाहरणे देत असतो; जशी येथे दोन उदाहरणे दिलीत. आणि अशाच प्रकारे, सू. बकरच्या सुरवातीला, दांभिकांसाठी उदाहरणे दिली आहेत. अशाच प्रकारे सू. नूर आ. ३९ -४० मध्ये काफिरांसाठी दोन उदाहरणे दिलीत आणि हदीर्शींमध्ये सुध्दा, नबी ﷺ नी उदाहरणांच्या सारखा राहील. मार्फत लोकांना, पुष्कळशा गोष्टी समजाविल्या. (तपशीला करिता पहावे तफसीर इब्ने कसीर)

१३) हा विषय, याच्यापूर्वी सुध्दा, दोन तीन वेळा येऊन चुकला.

१४) कारण की यांच्याकडून प्रत्येक लहान मोठ्या कर्माचा हिशेब घेतला जाईल. आणि त्यांचा मामला, ''ज्याच्याशी हिशेबाच्या बाबतीत चौकशी केली गेली, त्यांचे वांचणे मुश्कील आहे; त्याला शिक्षा होऊनच राहील.'' म्हणून पुढे सांगितले की, त्यांचे ठिकाण नरकाग्नी आहे.

اَفَمَنۡ يَّعۡلَمُ اَنَّمَاۤ اُنۡزِلَ اِلَيۡكَ مِنۡ رَّبِّكَ الۡحَقُّ كَمَنۡ هُوَ اَعۡمٰى ؕ اِنَّمَا يَتَذَكَّرُ اُولُوا الۡاَلۡبَابِ ۙ﴿۱۹﴾

**काय तो एक मनुष्य ज्याला हे ज्ञान असेल की, आपल्याकडे आपल्याच्या पालनकर्त्याकडून, जे उतारण्यांत आले आहे, ते सत्य आहे; त्या मनुष्यासारखा होऊ शकतो, जो आंधळा आहे.[१] उपदेश तर तेच ग्रहण करतात, जे बुध्दीमान असतील.[२] (१९)**

الَّذِيۡنَ يُوۡفُوۡنَ بِعَهۡدِ اللّٰهِ وَلَا يَنۡقُضُوۡنَ الۡمِيۡثَاقَ ۙ﴿۲۰﴾

**जे अल्लाहशी केलेल्या कराराला (वचनाला) पूर्ण करतात.[३] आणि (आपल्या) करारबंधनाला तोडत नाही.[४] (२०)**

وَالَّذِيۡنَ يَصِلُوۡنَ مَاۤ اَمَرَ اللّٰهُ بِهٖۤ اَنۡ يُّوۡصَلَ وَيَخۡشَوۡنَ رَبَّهُمۡ وَيَخَافُوۡنَ سُوۡٓءَ الۡحِسَابِ ؕ﴿۲۱﴾

**आणि अल्लाहने ज्या वस्तुंना जोडून ठेवण्याचा हुकूम दिला आहे, ते त्याला जोडतात.[५] आणि ते आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात, आणि कडक हिशेब घेतला जाण्याचा अंदेशा राखतात. (२१)**

وَالَّذِيۡنَ صَبَرُوا ابۡتِغَآءَ وَجۡهِ رَبِّهِمۡ وَاَقَامُوا الصَّلٰوةَ وَاَنۡفَقُوۡا مِمَّا رَزَقۡنٰهُمۡ سِرًّا وَّعَلَانِيَةً وَّيَدۡرَءُوۡنَ بِالۡحَسَنَةِ السَّيِّئَةَ اُولٰٓئِكَ لَهُمۡ عُقۡبَى الدَّارِ ۙ﴿۲۲﴾

**आणि ते आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेसाठी, सहनशिलता पत्करतात.[६] आणि नमाजींना बरोबर कायम करतात.[७] आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे, त्याला गुप्त व उघडपणे खर्च करितात.[८] आणि वाईटाला पण चांगल्याने निस्तारितात;[९] त्यांच्याच करितां परलोकाचे घर आहे.[१०] (२२)**

१) म्हणजे एक तो मनुष्य, जो कुरआनाच्या सत्यतेवर, आणि सच्चाईवर विश्वास ठेवत असेल, आणि दुसरा आंधळा असावा; म्हणजे ज्याला कुरआनाच्या सत्य होण्यावर शंका असावी. काय हे दोहो बरोबर होऊ शकतात? हे विचारणे नाकारण्यासाठी आहे. म्हणजे हे दोघे याप्रमाणे, बरोबर होऊ शकत नाही. ज्या प्रमाणे फेस आणि पाणी, किंवा सोने, तांबे आणि त्यांचा मळ, बरोबर होऊ शकत नाही.

२) म्हणजे ज्यांच्या जवळ, शुध्द अंत:करण, आणि योग्य बुध्दीमत्ता नसावी आणि ज्यांनी आपल्या अंत:करणाला पापांनी जंगयुक्त आणि आपल्या बुध्दीला नासवून टाकले असेल ते या कुरआनापासून उपदेश ग्रहणच करू शकणार नाही. यासाठी आवश्यक आहे की, ते अल्लाहच्या ज्ञानापासून फायदा उचलणारे, आणि शैतानच्या बुध्दीपासून तिरस्कार करणारे व त्यापासून बेजार असावे.

३) हे त्या बुध्दीमंतांचे वैशिष्ट वर्णन केले जात आहे. अल्लाहच्या कराराने अभिप्रेत, त्याचे आदेश आहेत; ज्यांना ते अंमलात आणतात. किंवा तो करार आहे, जो अहेदे अलस्त म्हटला जातो, ज्याचा तपशील सू. आअराफ मध्ये येऊन चुकला.

४) याच्याने अभिप्रेत, ते आपसातील करार बंधन आहेत, जे मनुष्य आपसात एक दुसऱ्याशी करतो. किंवा तो जो यांच्यात आणि यांच्या पालनकर्त्या दरम्यान आहे.

५) म्हणजे नाते संबंधांना तोडत नाही, किंबहुना त्यांना जोडतात. आणि प्रियजन आणि नातेवाईकांशी चांगला संबंध ठेवतात.

६) अल्लाहच्या आज्ञाभंजनापासून आणि पापांपासून वांचतात. हा सहनशिलतेचा एक प्रकार आहे. संकटात आणि परीक्षा घेण्यामध्ये, सहनशिलता पत्करतात. हा दुसरा प्रकार आहे. अल्लाहच्या आज्ञापालनात ऐहिक मौजमजा आणि फायदे यांचा त्याग करावा लागतो, हा सहनशिलतेचा तिसरा प्रकार आहे. ज्ञानी लोक तिन्ही प्रकारची सहनशिलता पत्करतात.

७) त्यांच्या मर्यादा, प्रसंगानुरूप आणि व्याकुळतेने, नम्रतेने, आणि नेमस्त कामासह, आपल्या मनमान्या पध्दतीने नव्हे.

८) म्हणजे जेथे जेथे आणि जेव्हा जेव्हापण, खर्च करण्याची आवश्यकता पडते, आपल्यात आणि परक्यात, गुप्तपणे आणि उघडपणे खर्च करतात.

९) म्हणजे यांच्याशी कोणी वाईट प्रकारे वर्तन करतो, तर ते त्याचे उत्तर चांगल्या प्रकारच्या वर्तनाने देतात. किंवा क्षमा करणे आणि विसरणे आणि सहनशिलता पत्करतात. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''वाईटाचे उत्तर अशा प्रकारे द्या, जे चांगले असेल. (जर तुम्ही असे कराल) तर तो मनुष्य जो तुमचा शत्रु आहे, असा होऊन जाईल, कीं जणू तो तुमचा जिवलग मित्र आहे. (हा - मीम सज्दा - ३४)

१०) म्हणजे जे या उच्च चारित्र्याने भारित, आणि चर्चित चांगल्या गोष्टींनी युक्त असे असतील, त्यांच्यासाठी परलोकाचे घर आहे.

جَنّٰتُ عَدْنٍ يَّدْخُلُوْنَهَا وَمَنْ صَلَحَ مِنْ اٰبَآئِهِمْ وَاَزْوَاجِهِمْ وَذُرِّيّٰتِهِمْ وَالْمَلٰٓئِكَةُ يَدْخُلُوْنَ عَلَيْهِمْ مِّنْ كُلِّ بَابٍ ﴿٢٣﴾

नेहमी राहण्याच्या बागा;[1] जेथे हे स्वत: जातील, आणि त्यांच्या वाडवडिलांतून आणि पत्न्या आणि संतती मधून सुध्दा जे सदाचरणी असतील;[2] त्यांच्या जवळ देवदूत प्रत्येक दरवाज्यातून येतील. २३

سَلٰمٌ عَلَيْكُمْ بِمَا صَبَرْتُمْ فَنِعْمَ عُقْبَى الدَّارِ ﴿٢٤﴾

म्हणतील की, तुम्हावर सलाम असो! सहनशिलतेच्या बदल्यात. किती चांगला मोबदला आहे त्या परलोकातील घराचा. २४

وَالَّذِيْنَ يَنْقُضُوْنَ عَهْدَ اللّٰهِ مِنْ بَعْدِ مِيْثَاقِهٖ وَيَقْطَعُوْنَ مَآ اَمَرَ اللّٰهُ بِهٖٓ اَنْ يُّوْصَلَ وَيُفْسِدُوْنَ فِى الْاَرْضِ اُولٰٓئِكَ لَهُمُ اللَّعْنَةُ وَلَهُمْ سُوْٓءُ الدَّارِ ﴿٢٥﴾

आणि जे लोक अल्लाहच्या करारबंधनाला, त्याला पक्के केल्यानंतर, तोडून टाकतात; आणि ज्या गोष्टींच्या जोडण्याचा, अल्लाहतआलाने हुकूम दिला आहे, त्यांना तोडून टाकतात, आणि जमिनीवर फिसाद फैलवितात, त्यांच्या करिता शाप आहेत; आणि त्यांच्या करिता वाईट ठिकाण आहे.[3] २५

اَللّٰهُ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَنْ يَّشَآءُ وَيَقْدِرُ وَفَرِحُوْا بِالْحَيٰوةِ الدُّنْيَا وَمَا الْحَيٰوةُ الدُّنْيَا فِى الْاٰخِرَةِ اِلَّا مَتَاعٌ ﴿٢٦﴾

अल्लाहतआला ज्याची इच्छितो, त्याची रोजी वाढवून देतो आणि कमी करून टाकतो;[4] हे तर ऐहिक जीवनांत (फारच) खूष होऊन गेलेत;[5] वास्तविक पाहता, इहलोक, परलोकाच्या तुलनेत फारच (क्षुल्लक) गोष्ट आहे.[6] २६

وَيَقُوْلُ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَوْلَآ اُنْزِلَ عَلَيْهِ اٰيَةٌ مِّنْ رَّبِّهٖ قُلْ اِنَّ اللّٰهَ يُضِلُّ مَنْ يَّشَآءُ وَيَهْدِيْٓ اِلَيْهِ مَنْ اَنَابَ ﴿٢٧﴾

काफिर म्हणतात की, याच्यावर कोणी निशाणी (चमत्कार) का अवतरीत करण्यात आला नाही? (आपण) सांगून टाका की, ज्याला अल्लाहतआला आडमार्गी भटकवू इच्छील, (त्याला आडमार्गी) भटकवून देतो. आणि जो त्याच्याकडे वळेल, त्याला मार्ग दाखवून देतो. २७

اَلَّذِيْنَ اٰمَنُوْا وَتَطْمَئِنُّ قُلُوْبُهُمْ بِذِكْرِ اللّٰهِ اَلَا بِذِكْرِ اللّٰهِ تَطْمَئِنُّ الْقُلُوْبُ ﴿٢٨﴾

ज्या लोकांनी ईमान आणले, त्यांची अंत: करणे अल्लाहच्या स्मरणाने, समाधान पावतात; लक्षात ठेवा, अल्लाहच्या स्मरणानेच, अंत:करणांना समाधान प्राप्त होत असते.[7] २८

اَلَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ طُوْبٰى لَهُمْ وَحُسْنُ مَاٰبٍ ﴿٢٩﴾

ज्या लोकांनी ईमान आणले आणि ज्यांनी चांगली कामे पण केलीत. त्यांच्या साठी धन्यता[8] आहे आणि उत्तम निवासस्थान २९

كَذٰلِكَ اَرْسَلْنٰكَ فِيْٓ اُمَّةٍ قَدْ خَلَتْ مِنْ قَبْلِهَآ اُمَمٌ لِّتَتْلُوَا عَلَيْهِمُ الَّذِيْٓ اَوْحَيْنَآ اِلَيْكَ وَهُمْ يَكْفُرُوْنَ بِالرَّحْمٰنِ قُلْ هُوَ رَبِّيْ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ عَلَيْهِ تَوَكَّلْتُ وَاِلَيْهِ مَتَابِ ﴿٣٠﴾

अशाच प्रकारे आम्ही आपणास, या लोक समुदायाकडे पाठविले[9] आहे; ज्याच्यापूर्वी अनेक लोकसमूह होऊन चुकले आहेत की आपण त्यांना आमच्याकडून जे वह्य आपल्यावर अवतरीत झाले आहे, वाचून दाखवावे; हे अल्लाह परम दयाळूला नाकारणारे आहेत.[10] आपण सांगून टाका की, माझा पालनकर्ता तर तोच आहे, ज्याच्याशिवाय वास्तविक, कोणीसुध्दा उपासनेच्या[11] लायक नाही. त्याच्यावरच माझा विश्वास आहे, आणि त्याच्याचकडे मी वळतो. ३०

१) 'अद्न' चा अर्थ आहे कायमचे, म्हणजे नेहमी राहण्याच्या बागा.

२) म्हणजे अशा प्रकारे, सदाचरणी जवळच्या नातेवाईकांना, आपसात एकत्र गोळा करून देईल, की, एकमेकांना पाहून त्यांना समाधान वाटावे. येथपावेतो की, मामुली दर्जाच्या स्वर्गवाश्याला, उच्च दर्जा प्रदान करेल; कारण की त्यांनी आपल्या जवळच्या नातेवाईकांसोबत एकत्र होऊन रहावे. फर्माविले, ''आणि ते लोक ज्यांनी ईमान आणले, आणि त्यांच्या संततीने ईमानासह त्यांचे अनुकरण केले, तर आम्ही त्यांना त्यांच्या बरोबर मिळवून देऊ; आणि आम्ही त्यांच्या कर्मांतून काहीही कमी करणार नाही.'' (सू. तूर-२१) याच्याने, जेथे हे ठाऊक झाले की, सदाचरणी नातेवाईकांना,

अल्लाहतआला स्वर्गात एकत्र गोळा करून देईल, तेथे हे पण ठाऊक झाले की, जर कोणाजवळ ईमान आणि चांगल्या प्रकारच्या कर्माचे भांडवल नसेल, तर तो स्वर्गात जाणार नाही. मग जरी त्याचे दुसरे फारच जवळचे नातेवाईक स्वर्गात चालले गेले असतील. कारण कीं, स्वर्गांत प्रवेश वंशावर आधारित नाही, ईमान आणि चांगल्या कर्मावर आधारित असेल ''ज्याला त्याचे कर्म, मागे सोडून जाईल, त्याला त्याचा वंश पुढे नेणार नाही.'' (स. मुस्लिम)

३) हा सदाचरणी लोकांबरोबर, दुराचरणी लोकांचा (परलोकांतील) परिणाम वर्णन केला. कारण कीं मनुष्याने या वाईट (परलोकातील) परिणामा पासून वांचण्याचा प्रयत्न करावा.

४) जेव्हा काफिर आणि मुशरिकांसाठी सांगण्यात आले की त्यांच्यासाठी वाईट घर आहे, तर मनात अशी शंका येऊ शकते की, या जगात तर त्यांना सर्व प्रकारच्या सुखसोयी आणि सवलती प्राप्त आहे. यांच्या निर्सनासाठी सांगण्यात आले की, इहलोकातील साज व सामान आणि उपजिविकेचे कमी जास्त असणे, हे अल्लाहच्या अधिकारात आहे तो त्याचे प्रयोजन आणि मर्जी, (ज्याला फक्त तोच जाणतो) च्याप्रमाणे कोणाला जास्त देतो, आणि आपण कोणाला कमी. रोजीची मुबलकता, या गोष्टीचा पुरावा नाही की, अल्लाहतआला त्यावर प्रसन्न आहे आणि कमीचा अर्थ हा नाही की, अल्लाहतआला त्यावर अप्रसन्न आहे.

५) कोणाला जर या जगात धनसंपत्ती खूप मिळत आहे, वास्तविक पाहता तो अल्लाहचा आज्ञाभंजक असेल, तर ही खुषी आणि आनंदाची गोष्ट नाही; कारण की, हे अल्लाहपासून सूट आहे, सवलत आहे. कोणास ठाऊक नाही कीं, केव्हा ही सवलत समाप्त होऊन जाईल; आणि अल्लाहच्या पकडीच्या पंजात येऊन जाईल.

६) हदीसमध्ये येते की, या जगाची वस्तुस्थिती, परलोकांच्या तुलनेत, अशा प्रकारे आहे, जसे कोणी मनुष्य आपले बोट, समुद्रांत टाकून बाहेर काढेल, तर त्याने पहावे की, समुद्राच्या पाण्याच्या तुलनेत किती पाणी त्यांच्या बोटावर आले आहे? (स.मुस्लिम) एका दुसऱ्या हदीसमध्ये आहे, की रसूलुल्लाह ﷺ चे जाणे बकरीच्या एका मृत पिलाजवळून झाले; तर त्याला पाहून आपण ﷺ नी फर्माविले, ''अल्लाहची शपथ! हे जग अल्लाहच्या जवळ याच्या पेक्षा सुध्दा जास्त क्षुल्लक आहे. जेवढे हे मेलेले पिलू, त्याच्या धन्यांजवळ, क्षुल्लक होते. जेव्हा त्यांनी त्याला फेकले.'' (स.मुस्लिम)

७) अल्लाहच्या स्मरणाने अभिप्रेत, त्याच्या एकेश्वरवादाचा उल्लेख करणे आहे. ज्याच्याने मुशरिकांच्या मनांत, तंगी आणि द्वेष निर्माण होऊन जाते;किंवा त्याची उपासना, कुरआनाचे पठण, नफील नमाजी आणि दुआ प्रार्थना आहेत, ज्या ईमानवाल्यांसाठीं, मनाचे खाद्य आहे; किंवा त्याच्या आदेशांचे व हुकूमाचे पालन व अंमलबजावणी आहे. ज्याच्या वाचून ईमान आणि ईशभय बाळगणारे असमाधानी राहतात.

८) 'तूबा' चे वेगवेगळे अर्थ सांगण्यात आले आहेत. उदाहरणार्थ भलाई, सत्कर्म, चमत्कार, हेवा, स्वर्गातील एक विशिष्ट वृक्ष किंवा विशिष्ट स्थान, वगैरे म्हणजे स्वर्गात त्याच्या देणग्या आणि त्यांच्या मौजा.

९) ज्याप्रमाणे आम्ही, आपणास पैगंबरीच्या प्रचारासाठी पाठविले आहे. आपल्या पूर्वीच्या लोकसमुदायात सुध्दा पैगंबर पाठविले होते. त्यांनापण अशाच प्रकारे नाकारण्यात आले. ज्याप्रमाणे आपल्याला नाकारण्यात आले; आणि ज्या प्रमाणे नाकारण्याच्या परिणामात, ते समाज अल्लाहच्या शिक्षेत पकडले गेले, यांना पण या परिणामापासून असावधान रहावयास नको.

१०) मक्केचे मुशरिक 'रहमान' शब्दाने फारच बुचकळ्यात पडत असत. हुदैबियाच्या कराराच्या वेळी सुध्दा जेव्हा, बिस्मिल्लाह् हिर्रहमान निर्रहीम चे शब्द लिहिले गेले तेव्हा त्यांनी म्हटले, ''हे रहमान, रहीम काय आहे?'' आम्ही जाणत नाही. (इब्ने कसीर)

११) म्हणजे रहमान माझा तो पालनकर्ता आहे, ज्याच्या शिवाय अन्य कोणी उपास्य नाही.

وَلَوْ أَنَّ قُرْآنًا سُيِّرَتْ بِهِ الْجِبَالُ أَوْ قُطِّعَتْ بِهِ
الْأَرْضُ أَوْ كُلِّمَ بِهِ الْمَوْتَىٰ ۗ بَل لِّلَّهِ الْأَمْرُ جَمِيعًا ۗ
أَفَلَمْ يَيْأَسِ الَّذِينَ آمَنُوا أَن لَّوْ يَشَاءُ اللَّهُ لَهَدَى
النَّاسَ جَمِيعًا ۗ وَلَا يَزَالُ الَّذِينَ كَفَرُوا تُصِيبُهُم
بِمَا صَنَعُوا قَارِعَةٌ أَوْ تَحُلُّ قَرِيبًا مِّن دَارِهِمْ حَتَّىٰ
يَأْتِيَ وَعْدُ اللَّهِ ۚ إِنَّ اللَّهَ لَا يُخْلِفُ الْمِيعَادَ ﴿٣١﴾

**आणि जर असे झाले असते, की, कुरआनाबरोबर पर्वत चालवून देण्यात आले असते; किंवा पृथ्वी तुकडे तुकडे करुन दिली गेली असती, किंवा मृतांशी गोष्टी करवून दिल्या गेल्या अस्त्या. (तरी सुध्दा त्यांनी ईमान आणले नसते.) गोष्ट अशी आहे की, सर्व कामे अल्लाहच्या हातात [१] आहेत. तर काय ईमानवाल्यांना या गोष्टीची खातीरजमा नाही की, जर अल्लाह इच्छिता तर सर्व लोकांना सरळ मार्ग दाखवून दिला असता; काफिरांना तर त्यांच्या 'कुफ्र' मुळे नेहमी कुठली ना कुठली शिक्षा पोहोचत राहील; किंवा त्यांच्या घरांच्या आजूबाजूला अवरित होत राहील, [२] तेथ पावेतो की, अल्लाहचा वायदा येऊन पोहोचेल. [३] खचितच अल्लाहतआला वायद्याच्या विरुध्द करीत नसतो.** ३१

وَلَقَدِ اسْتُهْزِئَ بِرُسُلٍ مِّن قَبْلِكَ فَأَمْلَيْتُ لِلَّذِينَ
كَفَرُوا ثُمَّ أَخَذْتُهُمْ ۖ فَكَيْفَ كَانَ عِقَابِ ﴿٣٢﴾

**आणि खचितच आपल्या पूर्वीच्या पैगंबरांबरोबर थट्टामस्करी केली गेली होती; [४] आणि मी पण काफिरांना ढील दिली होती; मग त्यांना (अचानक) पकडून घेतले; मग माझी शिक्षा कशी राहिली? [५]** ३२

أَفَمَنْ هُوَ قَائِمٌ عَلَىٰ كُلِّ نَفْسٍ بِمَا كَسَبَتْ ۗ وَجَعَلُوا
لِلَّهِ شُرَكَاءَ قُلْ سَمُّوهُمْ ۚ أَمْ تُنَبِّئُونَهُ بِمَا لَا يَعْلَمُ
فِي الْأَرْضِ أَم بِظَاهِرٍ مِّنَ الْقَوْلِ ۗ بَلْ زُيِّنَ لِلَّذِينَ
كَفَرُوا مَكْرُهُمْ وَصُدُّوا عَنِ السَّبِيلِ ۗ وَمَن يُضْلِلِ
اللَّهُ فَمَا لَهُ مِنْ هَادٍ ﴿٣٣﴾

**काय तो अल्लाह, जो निरिक्षक आहे, प्रत्येक माणसाच्या [६] कर्मांशी, त्या लोकांनी अल्लाहचे सरकतदार ठरविले आहेत; (आपण) त्यांना विचारा की, जरा त्यांची नावे [७] तर घ्या; काय तुम्ही अल्लाहला त्या गोष्टी सांगता, ज्या पृथ्वीतलावर जो जाणतच नाही? किंवा काय फक्त वरवरच्या गोष्टी बनवून सांगत आहात? [८] खरी गोष्ट अशी आहे की, कुफ्र करणाऱ्यांना त्यांचे डावपेच भले दिसू लागतात; [९] आणि ते सरळ मार्गाहून अडवून देण्यात आले आहेत. आणि ज्याला अल्लाह् मार्गभ्रष्ट करील, त्याला मार्ग दाखविणारा कोणी नाही [१०]** ३३

لَّهُمْ عَذَابٌ فِي الْحَيَاةِ الدُّنْيَا ۖ وَلَعَذَابُ الْآخِرَةِ أَشَقُّ ۖ
وَمَا لَهُم مِّنَ اللَّهِ مِن وَاقٍ ﴿٣٤﴾

**त्यांच्यासाठी ऐहिक जीवनात पण शिक्षा आहे, [११] आणि परलोकांतील शिक्षा, तर फारच जास्त कडक आहे. [१२] त्यांना अल्लाहच्या प्रकोपापासून वाचवणारा कोणीही नाही.** ३४

مَّثَلُ الْجَنَّةِ الَّتِي وُعِدَ الْمُتَّقُونَ ۖ تَجْرِي مِن
تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۖ أُكُلُهَا دَائِمٌ وَظِلُّهَا ۚ تِلْكَ عُقْبَى
الَّذِينَ اتَّقَوا ۖ وَّعُقْبَى الْكَافِرِينَ النَّارُ ﴿٣٥﴾

**त्या स्वर्गाचे वैशिष्टय, ज्याचा वायदा अल्लाहला भिऊन वागणाऱ्यांशी केला गेला आहे, की त्यांच्याखालून (पाण्याचे पाट) नद्या वाहत आहेत. त्याची फळे सदाबहार आहेत, आणि त्यांच्या सावल्यापण. हा आहे परिणाम अल्लाहला भिऊन चालणाऱ्यांचा; [१३] आणि काफिरांचा परिणाम नरकाग्नी आहे** ३५

१) इमाम इब्ने कसीर म्हणतात, प्रत्येक आकाशी ग्रंथाला कुरआन म्हटले जाते. ज्याप्रमाणे की एका हदीसमध्ये येते कीं, ह. दाऊद عليه السلام. जनावराला तयार करण्याचा आदेश देत, आणि इतक्या वेळात, एक वेळ कुरआनाचे पठण करून घेत असत. (स. बुखारी) येथे उघड गोष्ट आहे कुरआनाने अभिप्रेत जबूर आहे. अर्थ महावाक्याचा हा आहे की, जर पहिले, कोणी आकाशी ग्रंथ अवतीर्ण झाला असता की, ज्याला ऐकून पर्वत चालू लागते किंवा पृथ्वी तुकडे तुकडे होऊन गेली असती, किंवा मृतलोक बोलू लागले असते, तर कुरआन करीम मध्ये हे वैशिष्टय यांच्यापेक्षा चांगल्या प्रकारे आढळून आले असते. कारण की हे, श्रेष्ठत्व आणि साहित्य शैली, मागच्या सर्व पुस्तकांत उच्च आहे आणि काहींनी याचा अर्थ हा सांगितला आहे की, जर या कुरआनामुळे हे चमत्कार सादर झाले असते, तरी हे काफिर ईमान न आणते; कारण की ईमान आणणे न आणणे हे अल्लाहच्या मर्जीवर अवलंबून आहे, चमत्कारांवर नाहीं, म्हणूनच म्हटले आहे, ''सर्व काम अल्लाहच्या हातात आहे.''

२) जे यांचे प्रत्यक्षदर्शी आहे; किंवा त्यांच्या ज्ञानात अवश्य येईल; कारण की त्यांनी यापासून बोध घ्यावा.

३) म्हणजे कयामत येऊन जाईल, किंवा इस्लामवाल्यांना निर्विवाद विजय आणि वर्चस्व प्राप्त होऊन जाईल.
४) ही नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला सांत्वना आहे की, जर हे मक्केचे मुशरिक, आपल्या आवाहनाला मान्य करण्याशिवाय, आपल्या बरोबर थट्टा मस्करी आणि टिंगळटवाळी करीत आहे; तर ही काही नवी गोष्ट नाही, प्रत्येक पैगंबराबरोबर असाच मामला करण्यात आला आहे.
५) हदीसमध्ये सुध्दा येते की, ''अल्लाहतआला जालीमाला अवकाश देत जातो, येथ पावेतो की, जेव्हा त्याला धरतो, तर मग त्याला सोडत नाहीं,'' याच्यानंतर नबी सल्लल्लाहु अलैहि सल्लमनी हे महावाक्य पठण केले. ''अशा प्रकारे तुझ्या पालनकर्त्याची पकड आहे, जेव्हा तो जुलूम करणाऱ्या वस्त्यांना पकडतो; खचित्‌च त्याची पकड फारच दु:खदायक आणि कडक आहे.''(स. बुखारी व स. मुस्लिम)
६) येथे याचे उत्तर 'महजुफ' आहे. म्हणजे काय अल्लाहतआला आणी या खोट्या उपास्य बरोबर होऊ शकतात? ज्यांची ते उपासना करतात. जे कुणाला नफा किंवा नुकसान पोहोचविण्यावर ते समर्थ नाहीत तसेच ते पाहतही नाही आणि न बुद्धी आणि न समज बाळगतात.
७) म्हणजे आम्हाला पण तर दाखवा, कारण की आम्ही त्यांना ओळखावे. यासाठी की यांची काही वास्तविकताच नाहीं. म्हणून पुढे सांगितले, काय तुम्ही अल्लाह्‌ला त्या गोष्टी सांगता, ज्या त्याला भूपृष्ठावर ठाऊकच नाही; म्हणजे त्यांचे अस्तित्वच नाही. यासाठी की, जर यांचे जमिनीवर अस्‌तित्व असते, तर ते अल्लाहला अवश्य ठाऊक होऊन गेले असते; त्याच्यापासून तर कोठलीही वस्तू लपलेली नाही.
८) येथे 'जाहीर' गुमानाच्या अर्थांत आहे. म्हणजे या केवळ त्यांच्या गुमानी गोष्टी आहेत, अर्थ हा आहे कीं, तुम्ही त्या मूर्तीची उपासना या गुमानावर करतात कीं, ते नफा नुकसान पोहचवू शकतात. आणि तुम्ही त्यांची नावे पण उपास्य म्हणून ठेवली आहेत. वास्तविक हे तुमच्या आणि तुमच्या वाडवडिलांची ठेवलेली नावे आहेत. ज्याचे काही प्रमाण अल्लाह्‌ने उतारले नाहीं. हे फक्त गुमान आणि आपल्या मनेच्छेचे अनुकरण करतात.''(सू. नज्म-२३)
९) ''मक्र'' ने अभिप्रेत, त्यांच्या त्या मार्गभ्रष्ट श्रध्दा आणि कर्मे आहेत, ज्यांत शैतानाने त्यांना गुंतवून ठेविले आहे. शैतानाने मार्ग भ्रष्टतेवर सुध्दा सुदंर सुंदर आवरणे चढवून ठेवली आहेत.
१०) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''ज्याला अल्लाह्‌ मार्गभ्रष्ट करण्याचा इरादा करून घेईल, तर तू, अल्लाहकडून त्याच्यासाठी काही अधिकार बाळगत नाहीं,'' (सू. माईद- ४१) आणि आणखी सांगितले, '' जर तुम्ही त्यांच्या हिदायतची इच्छा बाळगत असाल, तर (लक्षात ठेवा) अल्लाह्‌तआला त्याला हिदायत देत नसतो ज्याला तो मार्गभ्रष्ट करून टाकतो. आणि त्याचा कोणी मददगार असणार नाही.'' (सू. नहल - ३७)
११) याच्याने अभिप्रेत ठार करणे आणि कैदी बनविणे, आहे, जे मुसलमानांबरोबर युध्दात त्या काफिरांच्या वाट्याला येते.
१२) ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम नी पण लिआन करणाऱ्या दांपत्त्याला फर्माविले, ''जगातील शिक्षां, परलोकातील शिक्षेपेक्षा फारच हलकी आहे.''(स. मुस्लीम, किताबुल लिआन) याच्याशिवाय जगातील शिक्षा (जशी काहीं, आणि जितकी काही असेल तरी सुध्दा) तात्कालीक आणि नष्ट होणारी आहे. आणि परलोकांतील शिक्षा कायमस्वरूपाची आहे. तिलाऱ्हास आणि नष्ट होणे नाही. याशिवाय नरकाग्नीची आग, या जगाच्या आगीच्या तुलनेत, ६९ पट जास्त दाहक आहे. आणि अशाच प्रकारे दुसऱ्या गोष्टी आहेत. म्हणून शिक्षेत कठीणता असण्यावर काय शंका असू शकते?
१३) 'कुफ्र' वाल्यांच्या वाईट परिणामाबरोबर, ईमानवाल्यांचा सुपरिणाम सांगून दिला; कारण की स्वर्ग प्राप्तीची लालसा आणि आवड, निर्माण व्हावी. याठिकाणी इमाम इब्ने कसीरने, स्वर्गाच्या देणग्या, मौजमजा, आणि त्यांची वैशिष्ट्यपूर्ण स्थिती वर आधारित हदीसी, वर्णन केल्या आहेत. ज्यांना तेथे पाहून घ्यावे.

وَالَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ يَفْرَحُوْنَ بِمَآ اُنْزِلَ اِلَيْكَ وَمِنَ الْاَحْزَابِ مَنْ يُّنْكِرُ بَعْضَهٗ ؕ قُلْ اِنَّمَآ اُمِرْتُ اَنْ اَعْبُدَ اللّٰهَ وَلَآ اُشْرِكَ بِهٖ ؕ اِلَيْهِ اَدْعُوْا وَاِلَيْهِ مَاٰبِ ﴿۳۶﴾

आणि ज्यांना आम्ही पुस्तक दिले आहे,[२] ते तर जे काही आपणावर उतारण्यात आले आहे, त्यावर खूष[३] होतात. आणि काही पंथ, याच्या काही गोष्टींना नाकारणारे आहेत.[४] आपण घोषणा करुन टाका की, मला तर फक्त हाच हुकूम देण्यात आला आहे की, मी अल्लाहची उपासना करावी; आणि त्याचे बरोबर (कोणाला) सरकतदार करु नये, मी त्याच्याचकडे बोलावितो आणि त्याच्याचकडे वळतो.(३६)

وَكَذٰلِكَ اَنْزَلْنٰهُ حُكْمًا عَرَبِيًّا ؕ وَلَئِنِ اتَّبَعْتَ اَهْوَآءَهُمْ بَعْدَ مَا جَآءَكَ مِنَ الْعِلْمِ ۙ مَا لَكَ مِنَ اللّٰهِ مِنْ وَّلِيٍّ وَّلَا وَاقٍ ﴿۳۷﴾

आणि अशाच प्रकारे आम्ही या कुरआनाला अरबी भाषेचे फर्मान म्हणून उतारले आहे.[५] जर आपण यांच्या इच्छेचे[६] अनुकरण केले, याच्यानंतर की आपल्या जवळ ज्ञान येऊन चुकले आहे.[७] तर अल्लाह् (च्या शिक्षे) पासून आपल्याला न कोणी पुरस्कर्ता मिळेल न कोणी वाचविणारा मिळेल.[८] (३७)

وَلَقَدْ اَرْسَلْنَا رُسُلًا مِّنْ قَبْلِكَ وَجَعَلْنَا لَهُمْ اَزْوَاجًا وَّذُرِّيَّةً ؕ وَمَا كَانَ لِرَسُوْلٍ اَنْ يَّاْتِيَ بِاٰيَةٍ اِلَّا بِاِذْنِ اللّٰهِ ؕ لِكُلِّ اَجَلٍ كِتَابٌ ﴿۳۸﴾

आणि आम्ही आपल्यापूर्वी सुध्दा, पुष्कळसे पैगंबर पाठवून चुकलो आहोत, आणि आम्ही त्यांना पत्न्या आणि मुलाबाळांवाले बनविले होते.[९] कोण्या पैगंबराकडून असे होऊ शकत नाही की, अल्लाहच्या परवानगी शिवाय, कोणी निशाणी घेऊन यावी.[१०] प्रत्येक निश्चित केलेल्या वायद्याला लिहिलेले आहे.[११] (३८)

يَمْحُوا اللّٰهُ مَا يَشَآءُ وَيُثْبِتُ ۚۖ وَعِنْدَهٗۤ اُمُّ الْكِتٰبِ ﴿۳۹﴾

अल्लाह जे इच्छील त्याला नाहीसे करून टाकेल; आणि जे इच्छील ते तसेच ठेवेल. आणि लौहे महफुज त्याच्याचजवळ आहे.[१२] (३९)

وَاِنْ مَّا نُرِيَنَّكَ بَعْضَ الَّذِيْ نَعِدُهُمْ اَوْ نَتَوَفَّيَنَّكَ فَاِنَّمَا عَلَيْكَ الْبَلٰغُ وَعَلَيْنَا الْحِسَابُ ﴿۴۰﴾

त्यांच्याशी केलेल्या वायद्यामधून काही जर आपणास दाखवून देऊ, किंवा आपल्यास आम्ही या जगातून उचलून घेऊ; तर आपल्यावर तर निव्वळ पोहोचवून देणेच आहे. आणि हिशेब घेणे ही आमच्याचकळे आहे.(४०)

اَوَلَمْ يَرَوْا اَنَّا نَاْتِي الْاَرْضَ نَنْقُصُهَا مِنْ اَطْرَافِهَا ؕ وَاللّٰهُ يَحْكُمُ لَا مُعَقِّبَ لِحُكْمِهٖ ؕ وَهُوَ سَرِيْعُ الْحِسَابِ ﴿۴۱﴾

काय ते पाहत नाही? आम्ही पृथ्वीला तिच्या किनाऱ्यांनी घटवीत चालले येत आहोत,[१३] आणि अल्लाह् हुकूम करितो, कोणी त्याच्या आदेशाला मागे टाकणारा[१४] नाही; आणि तो जलद् हिशेब घेणारा आहे. (४१)

وَقَدْ مَكَرَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ فَلِلّٰهِ الْمَكْرُ جَمِيْعًا ؕ يَعْلَمُ مَا تَكْسِبُ كُلُّ نَفْسٍ ؕ وَسَيَعْلَمُ الْكُفّٰرُ لِمَنْ عُقْبَى الدَّارِ ﴿۴۲﴾

यांच्या पूर्वीच्या लोकांनी सुध्दा, आपल्या डावपेचात कमी केले नव्हते. परंतु सर्व डाव पेच अल्लाहचेच आहेत.[१५] जो मनुष्य जे काही करीत आहे, ते सर्व अल्लाह्ला ठाऊक[१६] आहे. आणि काफिरांना आता ठाऊक होऊन जाईल, की या परलोकातील घर (जन्नत) कोणासाठी आहे; (४२)

وَيَقُوْلُ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَسْتَ مُرْسَلًا ؕ قُلْ كَفٰى بِاللّٰهِ شَهِيْدًا بَيْنِيْ وَبَيْنَكُمْ ۙ وَمَنْ عِنْدَهٗ عِلْمُ الْكِتٰبِ ﴿۴۳﴾

हे काफिर म्हणतात की, आपण अल्लाहचे पैगंबर नाहीत. आपण उत्तर द्या की, माझ्या आणी तुमच्या दरम्यान अल्लाह साक्षीसाठी पुरेसा आहे;[१७] आणि तो ज्याच्याजवळ पुस्तकाचे ज्ञान आहे.[१८] (४३)

१) याच्याने अभिप्रेत मुसलमान आहेत. आणि अर्थ आहे, जे कुरआनाच्या मागणीवर अंमलबजावणी करतात.

२) म्हणजे कुरआनाच्या सत्य होण्यावर प्रमाणे, व पुरावे पाहून आणखी खूष होतात.

३) याच्याने अभिप्रेत यहूदी, खिस्ती आणि फाफिर व मुशरिकीन आहेत. काहींच्या जवळ पुस्तकाने अभिप्रेत, तौरात आणि इंजील आहे. यांच्यातून जे मुसलमान झाले, ते आनंदित होतात. आणि नाकारणारे, ते यहूदी आणि खिस्ती आहेत, जे मुसलमान झाले नाहीत.

४) म्हणजे ज्याप्रमाणे आपल्या पूर्वीच्या पैगंबरावर, पुस्तके स्थानिक भाषेत अवतरीत केली, त्याचप्रमाणे कुरआन आपल्यावर, आम्ही अरबी भाषेत उतारले. कारण की, आपले पहिले संबोधित अरबवाले आहेत; जे फक्त अरबी भाषाच जाणतात. जर हे कुरआन, कोण्या दुसऱ्या भाषेत अवतरीत झाले असते, तर त्यांच्या समजण्याच्या पलिकडे असते; आणि हिदायतला मान्य न करण्याला त्यांच्यासाठी सबब बनून गेले असते. आम्ही कुरआनाला अरबीत अवतीर्ण करुन, ही सबब पण दूर करुन दिली.

५) याच्याने अभिप्रेत, ग्रंथधारी लोकांच्या काही या इच्छा आहेत, जे ते इच्छीत होते, की शेवटच्या काळांतील पैगंबराने त्यांचा अंगिकार करावा. उदाहरणार्थ, बैतुल मुकद्दसला नेहमीसाठी किबला बनवून ठेवावे. आणि त्यांच्या श्रध्दा

असलेल्या गोष्टींना विरोध करु नये. वगैरे.
६) याच्याने अभिप्रेत ते ज्ञान आहे, जो 'वह्या'मार्फत आपणास दिले गेले. ज्याच्यात ग्रंथधारी लोकांच्या श्रध्दास्थानांची वास्तविकतापण आपल्याला स्पष्ट करुन देण्यात आली.
७) ही वास्तविक, उम्मतच्या ज्ञानवंतांना तंबी आहे. की त्यांनी ऐहिक तात्कालीक फायद्यासाठी, कुरआन आणि हदीसच्या स्पष्ट आदेशाच्या विरोधांत, लोकांच्या इच्छेच्या मागे लागू नये. जर ते असे करतील, तर त्यांना अल्लाह्च्या शिक्षेपासून वाचविणारा कोणी असणार नाही.
८) म्हणजे आपल्या सहित जेवढे पण रसूल आणि पैगंबर आलेत, सर्व मनुष्यच होते; ज्यांचे घराणे आणि कुटुंब होते. आणि पत्नी, मुले बाळे होती. ते देवदूत किंवा मानवी चेहऱ्यात तेजस्वी सृष्टी नव्हते; परंतु मनुष्य जातीतूनच होते. कारण की, जर ते देवदूत असते, तर मानवांसाठी, त्यांना, त्यांच्याशी मिळून मिसळून जाणे, आणि त्यांच्या निकट जाणे, अशक्य होते. ज्यामुळे त्यांना पाठविण्याचा मूळ उद्देश्यच खलास झाला असता. आणि जर ते देवदूत, मनुष्य स्वरुपात येते तर दुनियेत त्यांचे न घराणे आणि कुटुंब असते, आणि न त्यांच्या पत्न्या व मुले बाळे असते; ज्याच्याने हे ठाऊक झाले की, सर्व पैगंबर, जातीच्या दृष्टीने, मनुष्यच होते. मानवी स्वरुपात देवदूत किंवा कोणी तेजस्वी सृष्टी नव्हती.
९) म्हणजे चमत्कार सादर करणे, पैगंबरांच्या अधिकारात नाही; की जेव्हा त्यांच्याकडे मागणी केली जाईल, तर त्यांनी त्याला सादर करुन दाखवावे; किंबहुना हे अल्लाह्च्या संपूर्ण अधिकारात आहे. तो आपल्या प्रयोजन आणि मर्जीनुसार निर्णय करतो. की, चमत्काराची आवश्यकता आहे किंवा नाही? आणि जर आहे, तर कशाप्रकारे आणि केव्हा दाखविला जावा?
१०) म्हणजे अल्लाह्ने ज्या गोष्टीचा पण वायदा केला आहे, त्याची एक वेळ निश्चित आहे. त्या ठराविक वेळेवर, त्याचे घडून येणे, होऊनच राहील. यासाठी की, अल्लाह्च्या वायद्याच्या विरुध्द होत नसते. आणि अर्थ आहे की, प्रत्येक तो आदेश, ज्याला अल्लाह्ने लिहून ठेवले आहे, त्याचा एकवेळ निश्चित आहे. म्हणजे मामला, काफिरांच्या इरादा आणि मन्शेवर नाही. किंबहुना फक्त आणि फक्त, अल्लाह्च्या मर्जीवर अवलंबून आहे.
१२) याचा एक अर्थ तर हा आहे की, तो ज्या हुकूमाला इच्छील, रद्द करुन टाकेन आणि ज्याला इच्छील त्याला शिल्लक ठेवीन. दुसरा अर्थ आहे की, त्याच्यात तो बदल करत असतो. त्याच्याचजवळ लौहे महफुज आहे. याचे समर्थन, काही हदीशी आणि सहाबांच्या म्हणण्यानुसार होते. उदाहरणार्थ एका हदिशीमध्ये येते की, 'मनुष्य गुन्ह्यांमुळे रोजी पासून वंचित केला जातो. दुआने दैव (प्रारब्ध) बदलून जाते. आणि प्रियजन आणि नातेवाईकांशी चांगली वागणूक, ने आयुष्यात वाढ होते.'' (मुसनद अहमद) काही सहाबा ﷺ कडून ही दुआ सांगण्यात येते. ''हे अल्लाह्! जर तू माझ्यावर दुर्दैव आणि गुनाह लिहिला आहे. तर त्याला पुसून टाक. यासाठी की तू जे इच्छील ते पुसून टाकशील आणि जे इच्छशील ते शिल्लक ठेवशील. तुझ्याचजवळ लौहे महफुज आहे. बस तू दुर्दैवाला, सुर्दैवाने आणि क्षमेने बदलून दे!'' या भावार्थ वर हा आक्षेप घेतला जाऊ शकतो की हदीसमध्ये तर येते की, ''जे काही होणार आहे, लेखणी त्याला लिहून कोरडी होऊन चुकली आहे. (स.बुखारी क्र. ६०७६) याचे उत्तर हे दिले गेले की, हे मिटवणे आणि बाकी ठेवणे सुध्दा, तसे पाहू जाता, अल्लाह्च्या मर्जीने, प्रारब्धानुसारच आहे. (फत्हुल कदीर)
१३) म्हणजे अरबांची मातृभूमी, मुशरिकीनवर हळूहळू आकसू लागली आहे. आणि इस्लामला वर्चस्व आणि भरभराटीचा काळ येऊ लागला आहे.
१४) म्हणजे कोणी अल्लाहच्या हुकूमांना रद्द करु शकत नाही.
१५) म्हणजे मक्केच्या मुशरिकीन पूर्वी सुध्दा लोक, पैगंबरांच्या मुकाबल्यात, छक्के पंजे करीत राहिले आहेत. परंतु अल्लाहच्या युक्तीच्या मुकाबल्यात, त्यांची कोणी युक्ती आणि डावपेच उपयोगी पडले नाही. अशाच प्रकारे उद्या सुध्दा, यांची कोणतीही चालबाजी, अल्लाह्च्या मर्जीपुढे टिकू शकणार नाही.
१६) तो याच्याप्रमाणेच बक्षीसी किंवा शिक्षा देणार. सज्जनाला त्याच्या पुण्याचे प्रतिफल, आणि दुर्जनाला त्याच्या पापाची शिक्षा.
१७) बस, तो जाणतो की, मी त्याचा खरा पैगंबर आहे. आणि त्याच्या संदेशाचा आवाहक आहे; आणि तुम्ही खोटे आहात.
१८) पुस्तकाने अभिप्रेत तौरात आणि इंजीलचे ज्ञान आहे; म्हणजे ग्रंथधारी लोकांतून ते लोक, जे मुसलमान होऊन गेले आहेत; जसे अब्दुल्लाह् बिन सलाम, सलमान फारसी, आणि तमीम दारी, वगैरे रजीअल्लाहु अन्हुम. म्हणजे हे पण समजतात की, मी अल्लाह्चा पैगंबर आहे. अरबचे मुशरिकीन, महत्त्वाच्या प्रकरणी, ग्रंथधारी लोकांकडून सल्ला घेत, आणि त्यांना विचारत असत. अल्लाह्तआलाने त्यांना मार्गदर्शन केले की, ग्रंथधारी लोक जाणतात. तुम्ही त्यांना विचारून घ्या. काही म्हणतात पुस्तकाने अभिप्रेत कुरआन आहे, आणि पुस्तकाला जाणणारे मुसलमान आहेत. आणि काहींनी पुस्तकाने अभिप्रेत, लौहे महफुज घेतले आहे. म्हणजे ज्याच्याजवळ लौहे महफुजचे ज्ञान आहे, म्हणजे अल्लाह् तबारक व तआला. परंतु पहिला भावार्थ जास्त योग्य आहे.

महावाक्ये ४२

# (१४) सू. इब्राहीम

रुकूअ ७

آياتها ٥٢ (١٤) سُورَةُ اِبْرٰهِيْمَ مَكِّيَّةٌ (٧٢) رُكُوعَاتُهَا ٧

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

الٓرٰ كِتٰبٌ اَنْزَلْنٰهُ اِلَيْكَ لِتُخْرِجَ النَّاسَ مِنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوْرِ ۙ بِاِذْنِ رَبِّهِمْ اِلٰى صِرَاطِ الْعَزِيْزِ الْحَمِيْدِ ۙ ﴿١﴾

**अलीफ-लाम रा. हे भव्य पुस्तक आम्ही, आपल्याकडे उतारले आहे; की आपण लोकांना अंध:कारातून, प्रकाशाकडे घेऊन (१) यावे; त्यांच्या पालनकर्त्याच्या हुकूमाने, (२) जो प्रबळ आणि स्तुत्य आहे. अशा अल्लाहच्या मार्गाकडे. १**

اللّٰهِ الَّذِيْ لَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ؕ وَوَيْلٌ لِّلْكٰفِرِيْنَ مِنْ عَذَابٍ شَدِيْدِ ۙ ﴿٢﴾

**ते अल्लाहचे आहे, जे काही आकाशात आणि पृथ्वीत आहे. आणि नाकारणाऱ्यांसाठी तर, कडक शिक्षेचा खेद आहे. २**

الَّذِيْنَ يَسْتَحِبُّوْنَ الْحَيٰوةَ الدُّنْيَا عَلَى الْاٰخِرَةِ وَيَصُدُّوْنَ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ وَيَبْغُوْنَهَا عِوَجًا ؕ اُولٰٓئِكَ فِيْ ضَلٰلٍ بَعِيْدٍ ﴿٣﴾

**जे परलोकाच्या तुलनेत ऐहिक जीवनाला पसंत करतात. आणि अल्लाहच्या मार्गापासून अडवितात; आणि त्यांच्यात वाकडेपणा, निर्माण करु इच्छिता; (३) हेच लोक फार पराकाष्टेच्या चुकीत आहेत. (४) ३**

وَمَآ اَرْسَلْنَا مِنْ رَّسُوْلٍ اِلَّا بِلِسَانِ قَوْمِهٖ لِيُبَيِّنَ لَهُمْ ؕ فَيُضِلُّ اللّٰهُ مَنْ يَّشَآءُ وَيَهْدِيْ مَنْ يَّشَآءُ ؕ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٤﴾

**आणि आम्ही प्रत्येक पैगंबराला त्याच्या राष्ट्रीय भाषेतच पाठविले आहे. कारण की, त्यांच्यासमोर, चांगल्याप्रकारे समजाऊ शकेल. (५) आता अल्लाह ज्याला इच्छील त्याला भटकवितो, आणि ज्याला इच्छितो त्याला मार्ग दाखवून देईल आणि तो परम समर्थ आणि बुध्दीमान आहे. (६) ४**

وَلَقَدْ اَرْسَلْنَا مُوْسٰى بِاٰيٰتِنَآ اَنْ اَخْرِجْ قَوْمَكَ مِنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوْرِ ۙ وَذَكِّرْهُمْ بِاَيّٰىمِ اللّٰهِ ؕ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّكُلِّ صَبَّارٍ شَكُوْرٍ ﴿٥﴾

**आणि (लक्षात ठेवा की, जेव्हा) आम्ही मूसाला आपल्या निशाण्या देऊन, पाठविले की तू, आपल्या लोकांना, अंधारातून प्रकाशाकडे आण (७) आणि त्यांना अल्लाहच्या उपकारांची आठवण करून (८) दे. नि:संशय यात निशाण्या आहेत, प्रत्येक सहनशिल, आणि आभार मानणाऱ्यासाठी (९) ५**

وَاِذْ قَالَ مُوْسٰى لِقَوْمِهِ اذْكُرُوْا نِعْمَةَ اللّٰهِ عَلَيْكُمْ اِذْ اَنْجٰىكُمْ مِّنْ اٰلِ فِرْعَوْنَ يَسُوْمُوْنَكُمْ سُوْٓءَ الْعَذَابِ وَيُذَبِّحُوْنَ اَبْنَآءَكُمْ وَيَسْتَحْيُوْنَ نِسَآءَكُمْ ؕ وَفِيْ ذٰلِكُمْ بَلَآءٌ مِّنْ رَّبِّكُمْ عَظِيْمٌ ﴿٦﴾

**आणि ज्यावेळी मूसाने आपल्या लोकांना सांगितले, की अल्लाहचे ते उपकार आठवण करा, जे त्याने तुमच्यावर केले आहेत. जेव्हा की त्याने तुम्हास फिरऔनाच्या लोकांपासून सुटका करून दिली, जे तुम्हास फार दु:ख पोहचवीत होते आणि तुमच्या मुलांना ठार मारीत आणि मुलींना जीवंत ठेवत असत; आणि यात तुमच्या पालनकर्त्या कडून, तुमची फार मोठी परीक्षा होती. (१०) ६**

وَاِذْ تَاَذَّنَ رَبُّكُمْ لَئِنْ شَكَرْتُمْ لَاَزِيْدَنَّكُمْ وَلَئِنْ كَفَرْتُمْ اِنَّ عَذَابِيْ لَشَدِيْدٌ ﴿٧﴾

**आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने तुम्हास सूचित (११) करून दिले की, जर तुम्ही आभार मानाल, तर नि:संशय मी तुम्हास जास्त (१२) देईन आणि जर तुम्ही कृतघ्नता दाखवाल, तर खचित्च माझी शिक्षा फारच कडक आहे. (१३) ७**

१) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणीपण अल्लाहतआलाने फर्माविले, ''तीच जात आहे, जी आपल्या सेवकांवर, स्पष्ट महावाक्यें अवतरित करते. कारण की त्याने तुम्हास अंध:कारातून काढून प्रकाशाकडे आणावे.'' (सू. हदीद -९) ''अल्लाह ईमानवाल्यांचा दोस्त आहे. तो त्यांना अंधारातून काढून, प्रकाशाकडे घेऊन जातो.''(सू. बकर: २५७)

२) म्हणजे पैगंबराचे काम, हिदायतचा मार्ग दाखविणे आहे. परंतु जर कोणी, त्या मार्गाचा अंगिकार करून घेतो, तर हे फक्त अल्लाहचा हुकूम आणि मर्जीनेच होते; कारण कीं, खरा मार्गदर्शक तोंच आहे. त्याची मर्जी जर नसेल, तर

पैगंबराने कितीही हितोपदेश करून घ्यावा; लोक हिदायतचा मार्ग अंगिकारण्याला, तयार होत नाहींत, ज्याची अनेक उदाहरणे, पूर्वींच्या पैगंबरांमध्ये आढळून येतात. स्वत: नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, तीव्र इच्छा असून सुध्दा, आपले दयाळू काका, अबुतालिबला मुसलमान बनवू शकले नाहीत.

३) याचा एक अर्थ तर हा आहे कीं, इस्लामच्या शिक्षणात, लोकांना बदगुमान करण्यासाठीं दोष काढीत, आणि त्याचे स्वरूप बदलून सादर करीत. दुसरा अर्थ हा आहे कीं, आपल्या गरजा आणि इच्छा प्रमाणे, त्यांच्यात बदल करू इच्छितात.

४) यासाठी कीं, त्यांच्यात चर्चित निरनिराळ्या खोडसाळ वृत्ती जमा होऊन गेल्या आहेत. उदाहरणार्थ परलोकाच्या तुलनेत, इहलोकाला प्राधान्य देणे; अल्लाह्च्या मार्गापासून लोकांना अडविणे, आणि इस्लाममध्यें वाकडेपणा शोधणे .

५) मग जेव्हा अल्लाह्तआलाने, जगातील लोकांवर हा उपकार केला की, त्यांच्या मार्गदर्शनासाठी, पुस्तके अवतरीत केली आणि पैगंबर पाठवले. तर या उपकाराची संपूर्णता अशा प्रकारे केली की, प्रत्येक पैगंबराला त्याच्या राष्ट्रीय भाषेंत पाठविले, कारण की कोणाला हिदायतचा मार्ग समजण्यात अडचण येऊ नये.

६) परंतु हे वर्णन आणि खुलाशावर सुद्धा हिदायत त्यालाच मिळेल ज्याला अल्लाह इच्छील.

७) म्हणजे ज्याप्रमाणे हे मोहम्मद! (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) आम्ही आपणास आपल्या लोकांकडे पाठविले, आणि पुस्तक अवतरीत केले, कारण की, आपण आपल्या लोकांना कुफ्र व शिर्कच्या अंधकारांतून काढून, ईमानाच्या प्रकाशाकडे आणावे; अशाच प्रकारे आम्ही मूसाला चमत्कार आणि प्रमाणे देऊन, त्यांच्या लोकांकडे पाठविले, जणू की अज्ञानाच्या अंध:कारातून काढून, ईमानाचा प्रकाश त्यांना द्यावा. आयातने अभिप्रेत ते चमत्कार आहेत; जे मूसा عليه السلام. ला प्रदान करण्यांत आले होते. किंवा ते नऊ चमत्कार आहेत. ज्यांचा उल्लेख सू. बनी इस्राईलमध्ये केला गेला आहे.

८) अय्यामिल्लाह्ने अभिप्रेत, अल्लाह्चे ते उपकार आहेत, जे बनी इसराईलवर केले गेले.; ज्यांचा तपशील पूर्वी कित्येक वेळा येऊन चुकला आहे. किंवा अय्याम घटनेच्या अर्थात आहेत. म्हणजे त्या घटनांची त्यांना आठवण करून दे, ज्यांच्यातून ते पार पडले आहेत. ज्यात त्यांच्यावर अल्लाहतआलाचे विशेष ईनाम झालेत ज्यातून काहींची चर्चा येथे पण येत आहे.

९) सहनशिलता आणि आभार दोन मोठ्या खुब्या आहेत. आणि ईमानाचा भर यांच्यावर आहे. म्हणून येथे फक्त या दोघांची चर्चा केली गेली आहे. दोन्ही अतिशयोक्तिच्या साच्यात ओतले आहेत, 'सब्बार' फार सहनशीलता पत्कारणारा, 'शकूर' फार आभार प्रदर्शन करणारा. आणि सहनशिलतेला, आभाराहून पुर्वी वर्णन केले आहे. कारण की, आभार, सहनशीलतेचाच परिणाम आहे. हदीसमध्ये आहे, रसूलुल्लाह् ﷺ नी फर्माविले, ''ईमानवाल्याचा मामला पण विचित्र आहे. अल्लाह्तआला त्याच्यासाठी, ज्याही हुकुमाचा निर्णय करील, तो त्याच्या बाबतीत उत्तम असतो. जर त्याला त्रास झाला आणि तो सहन करेन, हे पण त्याच्यासाठी उत्तम आहे. आणि जर त्याला काही आंनद होईल, तो त्यावर अल्लाह्चे आभार मानील, तर हे पण त्याच्या बाबतीत उत्तम आहे.'' (स. मुस्लिम)

१०) म्हणजे ज्याप्रमाणे ही एक फार मोठी परीक्षा होती, अशाच प्रकारे यापासून सुटका, हा अल्लाहचा फार मोठा उपकार होता. म्हणून काही भाष्यांतरकारांनी, 'बलाअ'चे भाषांतर परीक्षा आणि काहींनी उपकार केले आहे.

११) 'तअज्जना' चा अर्थ, त्याने आपल्या वायद्याबरोबर तुम्हास सावध आणि खबरदार करुन दिले आहे. आणि ही शंका पण आहे की, जे शपथेच्या स्वरुपात असावे. म्हणजे जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने, आपली प्रतिष्ठा, शान आणि मोठेपणाची शपथ खाऊन सांगितले. (इब्ने कसीर)

१२) देणग्यावर आभार मानल्याने आणखी बक्षीस देऊन, सन्मानीत करुन टाकेन.

१३) याचा अर्थ हा झाला की, देणग्यांप्रति कृतघ्नता. अल्लाहला मुळीच पसंत नाही. ज्यावर त्याने कडक शिक्षेची धमकी दिली आहे. म्हणून नबी सल्लल्लाहु अलौहि व सल्लमनी सुध्दा, फर्माविले की, स्त्रीयांपैकी बहुतेक, आपल्या पतींशी कृतघ्नता, केल्यामुळे, नरकाग्नीत जातील. अआजनाल्लाह् मिनहू! (स. मुस्लिम)

وَقَالَ مُوسٰۤى اِنْ تَكْفُرُوْۤا اَنْتُمْ وَمَنْ فِى الْاَرْضِ جَمِيْعًا ۙ فَاِنَّ اللّٰهَ لَغَنِىٌّ حَمِيْدٌ ﴿٨﴾

आणि मूसाने म्हटले की जर तुम्हीं, सर्व आणि जमिनीच्या पृष्टावर राहणारी सर्व माणसे, अल्लाहशी कृतघ्नता करतील, तरी सुध्दा अल्लाह् निरपेक्ष आणि सुस्तुत्य आहे.[१] (८)

اَلَمْ يَاْتِكُمْ نَبَؤُا الَّذِيْنَ مِنْ قَبْلِكُمْ قَوْمِ نُوْحٍ وَّعَادٍ وَّثَمُوْدَ ۛ وَالَّذِيْنَ مِنْۢ بَعْدِهِمْ ۛ لَا يَعْلَمُهُمْ اِلَّا اللّٰهُ ؕ جَآءَتْهُمْ رُسُلُهُمْ بِالْبَيِّنٰتِ فَرَدُّوْۤا اَيْدِيَهُمْ فِىْۤ اَفْوَاهِهِمْ وَقَالُوْۤا اِنَّا كَفَرْنَا بِمَاۤ اُرْسِلْتُمْ بِهٖ وَاِنَّا لَفِىْ شَكٍّ مِّمَّا تَدْعُوْنَنَاۤ اِلَيْهِ مُرِيْبٍ ﴿٩﴾

काय तुमच्याजवळ, तुमच्या पूर्वीच्या लोकांची बातमी आली नाही? म्हणजे नूहच्या लोकांची, आणि आद व समूदची, आणि त्यांच्या नंतरवाल्यांची. ज्यांना अल्लाहतआला शिवाय कोणी जाणत नाही. त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर चमत्कार घेऊन आले, परंतु त्यांनी आपले हात, आपल्याच तोंडात भरून घेतले.[२] आणि स्पष्ट सांगून टाकले की, जे काही तुम्हास देऊन, पाठविण्यात आले आहे, आम्ही त्याला नाकारणारे आहोत; आणि ज्या गोष्टीकडे, तुम्ही आम्हास बोलवित आहांत, आम्हाला तर यांच्यात मोठीच शंका आहे.[३] (९)

قَالَتْ رُسُلُهُمْ اَفِى اللّٰهِ شَكٌّ فَاطِرِ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ يَدْعُوْكُمْ لِيَغْفِرَ لَكُمْ مِّنْ ذُنُوْبِكُمْ وَيُؤَخِّرَكُمْ اِلٰۤى اَجَلٍ مُّسَمًّى ؕ قَالُوْۤا اِنْ اَنْتُمْ اِلَّا بَشَرٌ مِّثْلُنَا ؕ تُرِيْدُوْنَ اَنْ تَصُدُّوْنَا عَمَّا كَانَ يَعْبُدُ اٰبَآؤُنَا فَاْتُوْنَا بِسُلْطٰنٍ مُّبِيْنٍ ﴿١٠﴾

त्यांच्या पैगंबरांनी त्यांना सांगितले की काय हकतआला बद्दल तुम्हास शंका आहे? जो आकाश आणि पृथ्वीचा बनविणारा आहे; तो तर तुम्हास यासाठी बोलावित आहे की, तुमचे सर्व अपराध क्षमा करून टाकावेत;[४]आणि एका निश्चित वेळेपर्यंत, तुम्हास अवकाश द्यावा. त्यांनी सांगितले की, तुम्ही तर आमच्या सारखीच माणसे आहात;[५] तुम्ही इच्छितात की, आम्हास या देवांच्या उपासनेपासून मना करावे, ज्यांची उपासना आमचे वाडवडील करीत आले.[६] बरे तर, आमच्यासमोर कोणी स्पष्ट निशाणी सादर करा.[७] (१०)

قَالَتْ لَهُمْ رُسُلُهُمْ اِنْ نَّحْنُ اِلَّا بَشَرٌ مِّثْلُكُمْ وَلٰكِنَّ اللّٰهَ يَمُنُّ عَلٰى مَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ ؕ وَمَا كَانَ لَنَاۤ اَنْ نَّاْتِيَكُمْ بِسُلْطٰنٍ اِلَّا بِاِذْنِ اللّٰهِ ؕ وَعَلَى اللّٰهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُؤْمِنُوْنَ ﴿١١﴾

त्यांच्या पैगंबरांनी त्यांना सांगितले, की हे तर खरे आहे की, आम्ही तुमच्या सारखीच माणसे आहोत; परंतु अल्लाहतआला आपल्या सेवकांमधून, ज्यावर इच्छितो, त्यावर आपली कृपा करतो.[८] आणि अल्लाह्च्या हुकूमाशिवाय, आमच्यात हिंमत नाही की, आम्ही कोणी चमत्कार तुम्हास आणून दाखवावा.[९] आणि ईमानवाल्यांना फक्त, अल्लाहतआलावरच भरोसा ठेवला पाहिजे[१०] (११)

وَمَا لَنَاۤ اَلَّا نَتَوَكَّلَ عَلَى اللّٰهِ وَقَدْ هَدٰىنَا سُبُلَنَا ؕ وَلَنَصْبِرَنَّ عَلٰى مَاۤ اٰذَيْتُمُوْنَا ؕ وَعَلَى اللّٰهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُتَوَكِّلُوْنَ ﴿١٢﴾

आणि शेवटी काय कारण आहे की आम्ही अल्लाहवर भरोसा ठेवू नये, जेव्हा की, त्याने आम्हाला आमचे मार्ग सुचविले आहेत. ज्याही इजा तुम्ही आम्हास पोहचवाल, आम्ही त्यावर सहनशिलताच पत्करू. भरोसा करणाऱ्यांना हेच योग्य आहे की अल्लाहवरच भरोसा करावा.[११] (१२)

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لِرُسُلِهِمْ لَنُخْرِجَنَّكُمْ مِّنْ اَرْضِنَاۤ اَوْ لَتَعُوْدُنَّ فِىْ مِلَّتِنَا ؕ فَاَوْحٰۤى اِلَيْهِمْ رَبُّهُمْ لَنُهْلِكَنَّ الظّٰلِمِيْنَ ﴿١٣﴾

आणि काफिरांनी आपल्या पैगंबरांना सांगितले की, आम्ही तुम्हास देशातून काढून लाऊ, किंवा तुम्ही पुन्हा, आमच्या धर्मांत फिरून या, तर त्यांच्या पालनकर्त्यांने त्यांच्याकडे 'वह्य' पाठविले की, आम्ही या शिरजोरांनाच गारद करून टाकू.[१२] (१३)

१) अर्थ हा आहे की, मनुष्य अल्लाहचे आभार मानेल, तर त्यात त्याचाच फायदा आहे. कृतघ्नता दर्शवील, तर अल्लाह्चे त्यात काय नुकसान आहे? तो तर निरपेक्ष आहे. आलम दुनिया कृतघ्न होऊन जाईल, तर त्याचे काय बिघडेल? ज्याप्रमाणे हदीसे कुद्सीमध्ये येते, अल्लाहतआला फर्मावितो, ''हे माझ्या सेवकांनो! जर तुमचे पहिले आणि शेवटचे, आणि अशा प्रकारे सर्व मनुष्यें, आणि जिन्न, त्या एका माणसाच्या मनासारखे होऊन जातील, जो तुमच्यांत, सर्वात जास्त अल्लाहला भिणारा आणि सदाचरणी असेल, (म्हणजे कोणी पण आज्ञाभंजक राहणार नाही.) तर याच्याने माझे राज्य आणि बादशाहीमध्ये काही वाढ होणार नाही, हे माझ्या सेवकांनो! जर तुमचे पहिले आणि

शेवटचे, आणि अशा प्रकारे सर्व मनुष्ये आणि जिन्न, एक त्या माणसाच्या मनासारखे होऊन जातील, जो तुमच्यात सर्वात जास्त, आज्ञाभंजक आणि बदचलन असेल; तर याच्याने माझ्या राज्य आणि बादशाहीमध्ये, काही कमी होणार नाही. हे माझ्या सेवकांनो! जर तुमचे पहिले आणि शेवटचे, आणि अशा प्रकारे सर्व मनुष्ये, आणि जिन्न, सर्व एका मैदानात जमा होऊन जातील, आणि मजजवळ याचना करतील, मग मी प्रत्येक माणसाला त्याच्या याचनेप्रमाणे देईन, तर याच्याने माझे खजीने आणि बादशाहीमध्ये एवढेच कमी होईल, जेवढे सुईला, समुद्रांत बुडवून काढल्यानंतर, समुद्राच्या पाण्यात कमी होईल.'' फ सुबानहु व तआलाअल् गनीय्युल हमीद! (स. मुस्लिम)

२) भाष्यकारांनी याचे वेगवेगळेपण अर्थ केले आहेत. उदाहरणार्थ, (१) त्यांनी आपले हात आपल्या तोंडात ठेवून घेतले, आणि सांगितले की, आमचे तर फक्त एकच उत्तर आहे की, तुमच्या पैगंबरीला मानणारे नाही. (२) त्यांनी आपल्या बोटांनी आपल्या तोंडाकडे इशारा करुन सांगितले की, चूप बसा! आणि हे जो संदेश घेऊन आले आहेत, त्याच्याकडे लक्ष देऊ नका. (३) त्यांनी आपले हात, आपल्या तोंडावर, उपहास आणि आश्चर्य म्हणून ठेवून घेतले. ज्याप्रमाणे, कोणी मनुष्य आपले हसूआवरण्यासाठी, असे करतो. (४) त्यांनी आपले हात पैगंबरांच्या तोंडावर ठेवून, म्हटले चूप बसा! (५) प्रकोप आणि रागाने, आपले हात आपल्या तोंडात घालून घेतले. ज्याप्रमाणे दांभिकांच्या बाबतीत, दुसऱ्या ठिकाणी येते. 'ते तुमच्यावर रागारागाने, आपली बोटे चावून घेतात.'' (सू. आले इमरान- ११९) इमाम शौकांनी आणि इमाम तबरी यांनी या शेवटच्या अर्थाला प्राधान्य दिले आहे.

३) 'मुरीब' म्हणजे अशी शंका, ज्याच्याने मन बेचैन होऊन जाईल.

४) म्हणजे तुम्हास अल्लाहच्या बाबतीत शंका आहे? जो आकाश आणि पृथ्वीचा सृष्टीकर्ता आहे. याशिवाय तो ईमान आणि एकेश्वरवादाचे आमंत्रण फक्त यासाठी देतो की, तुम्हास पापांपासून पवित्र करुन घ्यावे, असे असून सुध्दा, तुम्ही या आकाश व पृथ्वीच्या सृष्टीकर्त्याला मानण्याला तयार नाहीत. आणि त्याच्या आमंत्रणाला तुमचा नकार आहे?

५) हा तोच संशय आहे जो काफिरांना येत राहिला की, मनुष्य असून, कशा प्रकारे कोणी अल्लाहचे 'वह्य' आणि पैगंबरीला पात्र होऊ शकतो? जसे आजपण, पैगंबराच्या मनुष्य होण्याचा इन्कार केला जातो.

६) हा दुसरा अडथळा आहे की, आम्ही त्या उपास्यांची भक्ती कशी काय सोडून द्यावी, ज्यांची भक्ती आमचे वाडवडील करीत आले आहे? जेव्हा की, तुमचा उद्देश, आम्हाला त्यांच्या भक्तीकडून फिरवून, एका उपास्याच्या भक्तीवर लावणे आहे.

७) प्रमाणे आणि चमत्कार तर प्रत्येक पैगंबरांबरोबर राहत असत, याच्याने अभिप्रेत अशी प्रमाणे आणि चमत्कार आहेत, ज्यांना पाहण्याची त्यांना इच्छा होती. जसे मक्केच्या मुशरिकीनने, हुजूर ﷺ कडे वेगवेगळ्या चमत्कारांची मागणी केली होती; ज्याची चर्चा सू. बनी इसराईलमध्ये येईल.

८) पैगंबरांनी पहिल्या शंकेचे उत्तर दिले की, खचित्च आम्ही तुम्हासारखी माणसेच आहोत; परंतु तुमचे हे समजणे चूक आहे की, मनुष्य पैगंबर होऊ शकत नाही. अल्लाहतआला मनुष्यांच्या हिदायत करिता, मनुष्यातूनच काही मनुष्यांना 'वह्य' आणि पैगंबरीसाठी निवडून घेतो. आणि तुम्हा सर्वांमधून हा उपकार, अल्लाहने आमच्यावर केला आहे.

९) त्यांच्या मनेच्छेप्रमाणे, चमत्काराच्या बाबतीत, पैगंबरांनी उत्तर दिले की, चमत्कारांचे सादर करणे आमच्या अखत्यारात नाही; हे फक्त अल्लाहच्या अखत्यारात आहे.

१०) येथे ईमानवाल्यांनी अभिप्रेत, प्रथम स्वत: पैगंबर आहेत. म्हणजे आम्ही संपूर्ण भरोसा, अल्लाहवरच ठेवला पाहिजे. जसे की, पुढे सांगितले की, 'शेवटी काय कारण आहे की, आम्ही अल्लाहवर भरोसा ठेवू नये.''

११) की तोच काफिरांच्या खोडसाळपणापासून आणि मूर्खपणा पासून वाचविणारा आहे. हा अर्थ पण होऊ शकतो की, आमच्याकडे चमत्कारांची मागणी करु नये, अल्लाहवर भरोसा ठेवावा. त्याची मर्जी असेल तर चमत्कार जाहीर करुन टाकेन, नाहीतर नाही.

१२) जसे आणखीही काही ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''आणि पहिले होऊन चुकला अणचा हुकूम आपल्या त्या सेवकांच्या बाबतीत, जे पैगंबर आहेत की, नि:संशय ते मदत दिले गेलेले आणि यशस्वी होतील, आणि आमचे सैन्य पण प्रबळ राहतील.'' (सू. साफ्फात १७१-१७३) ''अल्लाहने ही गोष्ट लिहून दिली आहे की, मी आणि माझे पैगंबर प्रबळ राहतील.'' (सू. मुजादेलाह्- २१)

وَلَنُسۡكِنَنَّكُمُ الۡاَرۡضَ مِنۡۢ بَعۡدِهِمۡ‌ؕ ذٰلِكَ لِمَنۡ خَافَ مَقَامِىۡ وَخَافَ وَعِيۡدِ ﴿۱۴﴾

आणि याच्यानंतर आम्ही स्वत: तुम्हास या भूमीत बसवू.[१] हे त्यांच्यासाठी आहे, जे माझ्यासमोर उभे राहण्याचे भय बाळगतील, आणि माझ्या धमकीने भयभित राहतील.[२] (१४)

وَاسۡتَفۡتَحُوۡا وَخَابَ كُلُّ جَبَّارٍ عَنِيۡدٍۙ ﴿۱۵﴾

आणि त्यांनी फैसल्याची मागणी केली,[३] आणि तमाम हेकेखोर दंडेलाचा हिरमोड झाला. (१५)

مِّنۡ وَّرَآئِهٖ جَهَنَّمُ وَيُسۡقٰى مِنۡ مَّآءٍ صَدِيۡدٍۙ ﴿۱۶﴾

त्याच्यासमोर नरकाग्नी आहे, तेथे त्याला पुंवाचे पाणी पाजण्यात येईल.[४] (१६)

يَّتَجَرَّعُهٗ وَلَا يَكَادُ يُسِيۡغُهٗ وَيَاۡتِيۡهِ الۡمَوۡتُ مِنۡ كُلِّ مَكَانٍ وَّمَا هُوَ بِمَيِّتٍ‌ؕ وَمِنۡ وَّرَآئِهٖ عَذَابٌ غَلِيۡظٌ ﴿۱۷﴾

ज्याला फार मुशकिलीने घोंट घोंट पिईल. तरी त्याला घशाखाली उतरवू शकणार नाही. आणि त्याच्या चोहोबाजूने मृत्यु येतांना दिसून येईल; परंतु तो मरणार नाही.[५] मग त्याच्यानंतर सुध्दा कडक शिक्षा आहे. (१७)

مَثَلُ الَّذِيۡنَ كَفَرُوۡا بِرَبِّهِمۡ‌ اَعۡمَالُهُمۡ كَرَمَادِ ۨاشۡتَدَّتۡ بِهِ الرِّيۡحُ فِىۡ يَوۡمٍ عَاصِفٍ‌ؕ لَا يَقۡدِرُوۡنَ مِمَّا كَسَبُوۡا عَلٰى شَىۡءٍ‌ؕ ذٰلِكَ هُوَ الضَّلٰلُ الۡبَعِيۡدُ ﴿۱۸﴾

त्या लोकांचे उदाहरण, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याला नाकारले, त्यांची कर्मे, त्या राखेसारखी आहेत, जिच्यावर जोराचा वारा, वादळाच्या दिवशी, चालला,[६] जे काही यांनी केले आहे, यातून कोठलीही गोष्ट यांच्या कामा येणार नाही; हेच पराकाष्टेचे अपयश आहे. (१८)

१) हा विषय पण अल्लाहतआलाने कित्येक ठिकाणी वर्णन केला आहे. उदाहरणार्थ ''आम्ही जबूर मध्ये लिहून टाकले की, उपदेश ग्रहण करणारे, देशाचे वारस होतील माझे पुण्यवान सेवक.'' (सू.अंबिया १ ते ५) आणखी पहावे सू. आअराफ- १२८/ १३७) म्हणून, याच्याप्रमाणे अल्लाहतआलाने नबी करीम ﷺ ची मदत केली. आपली इच्छा नसताना तरीसुध्दा, मक्केहून निघावे लागले. परंतु थोड्याच वर्षानंतर आपण ﷺ विजयी म्हणून मक्केत दाखल झाले. आणि आपल्याला निघण्याला भाग पाडणारे, जुलूमी मुशरिकीन शिर वांकवून, उभे, आपल्या शेवटच्या इशाऱ्याच्या प्रतिक्षेत होते. परंतु आपण ﷺ नी उच्च दर्जाच्या वागणूकीचे प्रदर्शन करुन, 'ला तसरीब अलैकुम' सांगून सर्वांना क्षमा करुन टाकले. सलवातुल्लाहे व सलामुहु अलैहि.

२) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, 'जो आपल्या पालनकर्त्यापुढे उभे राहण्यास भ्याला; आणि आपल्या मनाला, इच्छेपासून वांचविले, खचित्च स्वर्ग त्याचे ठिकाण आहे.'' (सू. नाजिआत ४०-४१) ''जो आपल्या पालनकर्त्यापुढे उभे राहण्याला भ्याला, त्याच्यासाठी दोन स्वर्ग आहेत. '' (सू. रहमान- ४६)

३) याचे 'फाईल' जुलूमी मुशरिकपण होऊ शकतात की, त्यांनी शेवटी, अल्लाहकडून फैसल्याची मागणी केली. म्हणजे जर हे पैगंबर खरे आहेत, तर हे अल्लाह! आम्हाला आमच्या शिक्षेने नष्ट करुन टाक. जसे मक्केच्या मुशरिकांनी म्हटले, ''हे अल्लाह! जर हे कुरआन, तुझ्याकडून (च) खरे आहे. तर आमच्यावर आकाशांतून दगडांचा वर्षाव कर. किंवा आमच्यावर कोणी दु:खदायक शिक्षा अवतरीत कर (सू. अन्फाल- ३२) किंवा ज्याप्रमाणे बद्रच्या युध्दाच्या प्रसंगी सुध्दा, मक्केच्या मुशरिकांनी अशाच प्रकारची इच्छा व्यक्त केली होती. ज्याचा उल्लेख अल्लाहने, सू. अनफाल- १९ मध्ये केला आहे. किंवा याचा 'फाईल' पैगंबर आहे, की त्यांनी, अल्लाहकडे विजय आणि मदतीसाठी दुआ केल्यात ज्यांना अल्लाहने मान्य केल्यात.

४) 'सदीद' पू आणि रक्त जे नर्कवासियांच्या मास आणि चामडीतून वाहिले असेल. काही हदीशींमध्ये त्याला ''नर्कवासियांच्या शरीरातून पिळून काढलेले.'' (मुसनद अहमद) आणि काही हदीशी मध्ये आहे की, हे सदीद इतके उष्ण आणि उकळते असेल की, त्यांच्या तोंडाजवळ पोहचताच त्यांच्या चेहऱ्याची चामडी जळून, गळून पडेल, आणि त्याचा एक घोट पिताच, त्याच्या पोटातील आतड्या, संडासाच्या जागेतून बाहेर निघून पडतील. अआजनल्लाह् मिनहू!

५) म्हणजे निरनिराळ्या प्रकारच्या शिक्षा भोगून भोगून, तो मृत्युची आकांक्षा करेल. परंतु, मृत्यू तेथे कोठे? तेथे तर अशा प्रकारची कायमची शिक्षा होईल.

६) कयामतच्या दिवशी, काफिरांच्या कर्मांची पण हीच स्थिती होईल, की, त्यांना याचे काही प्रतिफल आणि पुण्यफल मिळणार नाही.

أَلَمْ تَرَ أَنَّ اللَّهَ خَلَقَ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضَ بِالْحَقِّ ۚ
إِن يَشَأْ يُذْهِبْكُمْ وَيَأْتِ بِخَلْقٍ جَدِيدٍ ﴿١٩﴾

काय तू पाहिले नाहीस की, अल्लाहतआलाने आकाशांना आणि पृथ्वीला उत्कृष्ट संकल्पाने निर्माण केले आहे. जर तो इच्छील, तर तुम्हा सर्वांस नष्ट करुन टाकील; आणि नवीन सृष्टी आणेल. (१९)

وَمَا ذَٰلِكَ عَلَى اللَّهِ بِعَزِيزٍ ﴿٢٠﴾

आणि अल्लाहसाठी हे काम, काहीही कठीण नाही.[१] (२०)

وَبَرَزُوا لِلَّهِ جَمِيعًا فَقَالَ الضُّعَفَاءُ لِلَّذِينَ اسْتَكْبَرُوا
إِنَّا كُنَّا لَكُمْ تَبَعًا فَهَلْ أَنتُم مُّغْنُونَ عَنَّا مِنْ عَذَابِ
اللَّهِ مِن شَيْءٍ ۚ قَالُوا لَوْ هَدَانَا اللَّهُ لَهَدَيْنَاكُمْ ۖ سَوَاءٌ
عَلَيْنَا أَجَزِعْنَا أَمْ صَبَرْنَا مَا لَنَا مِن مَّحِيصٍ ﴿٢١﴾ ع ٩ / ١٥

आणि सर्वच्या सर्व, अल्लाहच्या समोर उभे असतील;[२] यावेळी दुर्बल लोक, शेखी मिरविणाऱ्यांना सांगतील की, आम्ही तर तुमच्या आज्ञांकीत होतो; तर काय तुम्ही, अल्लाहच्या शिक्षेतून, काही शिक्षा, दूर करु शकणार आहात? ते उत्तर देतील की, जर अल्लाह आम्हास हिदायत देता; तर आम्ही सुध्दा तुम्हास अवश्य मार्गदर्शन करतो, आता तर आम्हावर व्याकूळ होणे आणि सहन करणे, दोन्हीही समान आहेत. आमच्यासाठी काही सुटका नाही.[३] (२१) ९ / १५

وَقَالَ الشَّيْطَانُ لَمَّا قُضِيَ الْأَمْرُ إِنَّ اللَّهَ وَعَدَكُمْ
وَعْدَ الْحَقِّ وَوَعَدتُّكُمْ فَأَخْلَفْتُكُمْ ۖ وَمَا كَانَ لِيَ
عَلَيْكُم مِّن سُلْطَانٍ إِلَّا أَن دَعَوْتُكُمْ فَاسْتَجَبْتُمْ لِي ۖ
فَلَا تَلُومُونِي وَلُومُوا أَنفُسَكُم ۖ مَّا أَنَا بِمُصْرِخِكُمْ
وَمَا أَنتُم بِمُصْرِخِيَّ ۖ إِنِّي كَفَرْتُ بِمَا أَشْرَكْتُمُونِ مِن
قَبْلُ ۗ إِنَّ الظَّالِمِينَ لَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿٢٢﴾

जेव्हा आणि कामांचा फैसला करुन टाकला जाईल, तेव्हा शैतान[४] म्हणेल, की अल्लाहने तर तुम्हास खरा वायदा दिला होता, आणि मी तुमच्याशी जे वायदे केले होते, त्यांच्या विरुध्द केले;[५] माझे तुमच्यावर काही दडपण तर नव्हतेच,[६] होय! मी तुम्हाला बोलाविले, आणि तुम्ही माझे ऐकले.[७] आता तुम्ही मला दोषारोप करु नका. किंबहुना स्वत:च आपल्या ठाई निर्भत्सना करा;[८] न मी तुमची फिर्याद ऐकणारा, न तुम्ही माझ्या फिर्यादीला पोहोचणारे;[९] मी तर सुरुवातीपासूनच मानत नाही की, तुम्ही याच्यापूर्वी मला अल्लाहचा सरकतदार ठरवीत राहिले.[१०] खचित्‌च जालिमांसाठी दु:खदायक शिक्षा आहे.[११] (२२)

وَأُدْخِلَ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ جَنَّاتٍ تَجْرِي
مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ خَالِدِينَ فِيهَا بِإِذْنِ رَبِّهِمْ ۖ
تَحِيَّتُهُمْ فِيهَا سَلَامٌ ﴿٢٣﴾

आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कामे केली, ते त्या स्वर्गात दाखल केले जातील, ज्यांच्याखाली पाट वाहत आहेत. जेथे त्यांना नित्य राहणे होईल, आपल्या पालनकर्त्याच्या हुकूमाने[१२] जेथे त्यांचे अभिनंदन सलाम, सलामच असेल.[१३] (२३)

أَلَمْ تَرَ كَيْفَ ضَرَبَ اللَّهُ مَثَلًا كَلِمَةً طَيِّبَةً كَشَجَرَةٍ
طَيِّبَةٍ أَصْلُهَا ثَابِتٌ وَفَرْعُهَا فِي السَّمَاءِ ﴿٢٤﴾

काय आपण पाहिले नाही की, अल्लाहतआलाने पवित्र गोष्टीचे उदाहरण कशा प्रकारे वर्णन केले; उदाहरणार्थ एक पवित्र वृक्ष आहे, ज्याची मुळे मजबूत आहेत; आणि ज्याच्या फांद्या गगनांत पोहचल्या आहेत; (२४)

تُؤْتِي أُكُلَهَا كُلَّ حِينٍ بِإِذْنِ رَبِّهَا ۗ وَيَضْرِبُ اللَّهُ
الْأَمْثَالَ لِلنَّاسِ لَعَلَّهُمْ يَتَذَكَّرُونَ ﴿٢٥﴾

जो आपल्या पालनकर्त्याच्या हुकूमाने, नेहमी फळे देतो.[१४] आणि अल्लाहतआला लोकांच्यासमोर उदाहरणे वर्णन करतो; कारण की, त्यांनी बोध घ्यावा. (२५)

وَمَثَلُ كَلِمَةٍ خَبِيثَةٍ كَشَجَرَةٍ خَبِيثَةٍ اجْتُثَّتْ
مِن فَوْقِ الْأَرْضِ مَا لَهَا مِن قَرَارٍ ﴿٢٦﴾

आणि अपवित्र गोष्टीचे उदाहरण, घाणेरड्या वृक्षासारखे आहे. जो जमिनीच्या थोड्याशा वरच्या भागांतून, उपटून घेतला गेला; त्याला काहीं मजबुतीतर नाही[१५] (२६)

१) म्हणजे, जर तुम्ही आज्ञाभंजनापासून परावृत्त झाला नाही, तर अल्लाहतआला यावर समर्थ आहे की, तो तुम्हास नष्ट करुन, तुमच्या जागी नवी सृष्टी निर्माण करुन टाकेन. हाच विषय अल्लाहने सू. फातिर १५-१७, सू. मोहम्मद- ३८, सू. माईद- ५४, आणि सू. निसा- १३३ मध्ये सुध्दा वर्णन केला आहे.

२) म्हणजे सर्व हशरच्या मैदानात अल्लाहच्या समक्ष असतील, कोणी कोठे लपू शकणार नाही.

३) काही म्हणतात की (जहन्नमी) नर्कवासी आपसात म्हणतील, की स्वर्गवाश्यांना स्वर्ग याच्यासाठी मिळाला की ते अल्लाह्च्या समोर रडत आणि व्याकुळता दाखवित. या! आम्ही सुध्दा अल्लाह्कडे रडून गाऱ्हाणे करू; म्हणून ते

रडतील आणि खूप गाऱ्हाणे करतील. परंतु याचा काही उपयोग होणार नाही. मग म्हणतील स्वर्गवाश्यांना स्वर्ग त्यांच्या सहनशिलतेने मिळाला. चला, आपण पण सहन करूया. मग ते सहनशिलतेचे भरपूर प्रदर्शन करतील. परंतु याचा पण काही उपयोग होणार नाही. मग ते त्यावेळी म्हणतील कीं, आम्ही सहन करू किंवा हाय बाप, आता सुटकेचा काही मार्ग नाहीं. ते त्यांच्याआपसात बोलणे नर्काच्या आत होईल. कुरआन करीममध्ये याला, आणखी कित्येक ठिकाणी वर्णन केले आहे. उदा. सू.मोमिन -४७,४८, सू. आअराफ- ३८,३९, सू अहजाब-६६,६८. याच्या शिवाय ते आपसात झगडतील सुध्दा आणि एक दुसऱ्यावर मार्ग भ्रष्ट करण्याचा आरोप करतील. इमाम इब्ने कसीर म्हणतात की भांडण महेशराच्या मैदानांत होईल याचा आणखी खुलासा अल्लाहृतआलाने, सू. सबा आ. ३१ ते ३३, मध्ये वर्णन केला आहे.

४) म्हणजे ईमानवाले स्वर्गात, आणि कुफ्र आणि शिर्कवाले नरकाग्नीत चालले जातील, तेव्हा शैतान नरकवासियांना म्हणेल.

५) अल्लाह्ने जे वायदे आपल्या पैगंबरांमार्फत केले होते, की मुक्ती माझ्या पैगबरांवर ईमान आणण्यात आहे, ते खरे होते. त्याच्या तुलनेत तर माझे (शैतान) वायदे तर निव्वळ धोका आणि फसवणूक होते. ज्याप्रमाणे अल्लाहने फर्माविले, ''शैतान त्यांच्याशी वायदे करतो, आणि आशा लावतो; परंतु शैतानाचे हे वायदे आणि आशा निव्वळ धोका आहेत''. (सू. निसा-१२०)

६) दुसरे हे की माझ्या गोष्टीत, काही प्रमाण आणि तर्क सुसंगता नसे, न माझे काही दडपण तुमच्यावर होते.

७) हां! माझे फक्त आमंत्रण आणि बोलविणे होते. तुम्ही माझ्या काही प्रमाण नसणाऱ्या, आवाहनाला मान्य करून घेतले. आणि पैगंबराच्या, प्रमाण आणि तर्क सुसंगताने भरपूर (युक्त) गोष्टींना रद्द करून टाकले.

८) यासाठी की दोष सर्व तुमचा स्वत:चाच आहे, तुम्ही बुध्दी आणि अक्कल हुशारीने काम केले नाही. स्पष्ट प्रमाणांना तुम्ही दृष्टी आड करून टाकले. आणि खोट्या दाव्यांच्या मागे लागून राहिले; ज्यांच्यामागे कुठलेही प्रमाण नव्हते.

९) म्हणजे न मी तुम्हास या शिक्षातून काढवूशकतो, ज्यात तुम्ही ग्रस्त आहात; आणि न तुम्ही त्या रागात प्रकोपापासून मला वाचवू शकता, जो अल्लाह्कडून माझ्यावर आहे.

१०) मला या गोष्टीपासून पण इन्कार आहे कीं, मी अल्लाह्चा सरकतदार आहे. जर तुम्ही मला, किंवा आणखी कोणाला अल्लाहचा सरकतदार ठरवीत राहिले तर ती तुमची चूक आणि नादानी होती. ज्या अल्लाह्ने सारे ब्रम्हांड बनविले होते, आणि त्याची व्यवस्थापण तोच करीत राहिला, तर बरे! त्याचा कोणी सरकतदार कसा होऊ शकतो?

११) म्हणजे, असे म्हणतात की, हे वाक्यपण शैतानाचेच आहे आणि हा चर्चित प्रवचनाचा समारोप आहे. काही म्हणतात की, शैतानाचे म्हणणे, 'मिन् कब्ल' वर संपले हे अल्लाहृतआलाचे म्हणणे आहे.

१२) ही कठोर मनाचे आणि कुफ्रवाल्यांच्या तुलनेत, सद्भाग्यी आणि ईमानवाले, यांची चर्चा आहे यांचा उल्लेख, त्यांच्या बरोबर यांच्यासाठी केला गेला आहे, कारण की, लोकांमध्ये, ईमानवाल्यांचे कर्तृत्व, अंगिकारण्याला प्रोत्साहन मिळावे, आणि आवड निर्माण व्हावी.

१३) म्हणजे आपसात त्यांचे अभिवादन, एक दुसऱ्याला सलाम करणे असेल. याच्याशिवाय देवदूत सुध्दा प्रत्येक दरवाज्यातून प्रवेश करुन त्यांना सलाम सादर करत राहतील.

१४) याचा अर्थ आहे की, ईमानवाल्याचे उदाहरण, त्या वृक्षाप्रमाणे आहे, जो उन्हाळा असो अथवा थंडी, नेहमी फळें देत असतो. अशाच प्रकारे ईमानवाल्याची चांगली कर्मे, रात्रंदिवसांच्या क्षणात, नेहमी प्रत्येक वेळी, आकाशाकडे घेऊन जाण्यात येतात. पवित्र शब्द, इस्लाम किंवा 'ला इलाहा इल्लल्लाह्' आणि पवित्र वृक्षाने, खजुरीचा वृक्ष अभिप्रेत आहे. जसे की, सहीह हदीस नें सिध्द आहे. (स.बुखारी स. मुस्लिम)

१५) वाईट शब्दांनी अभिप्रेत कुफ्र आणि घाणेरडा वृक्ष'हनजल'(कडू इंद्रावन) चा वृक्ष अभिप्रेत आहे. ज्याचे मूळ जमिनीच्या वरच असते, आणि जराशा प्रयत्नाने उपटले जाते. म्हणजे काफिरांच्या कर्मांची काहीच बिशात नाही, न ते आकाशावर चढतात; न ते अल्लाह्च्या दरबारात मान्यतेचा दर्जा प्राप्त करतात.

يُثَبِّتُ اللّٰهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا بِالْقَوْلِ الثَّابِتِ فِی الْحَيٰوةِ الدُّنْيَا وَفِی الْاٰخِرَةِ ۚ وَيُضِلُّ اللّٰهُ الظّٰلِمِيْنَ ۙ۫ وَيَفْعَلُ اللّٰهُ مَا يَشَآءُ ۠﴿۲۷﴾

ईमानवाल्यांना, अल्लाहतआला पक्क्या गोष्टी बरोबर मजबुत ठेवतो; ऐहिक जीवनांत पण, आणि परलोकात पण.[१] हां! अन्यायी लोकांना अल्लाह बहकवून देतो. आणि अल्लाह जे इच्छितो ते करून टाकतो. (२७)

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْنَ بَدَّلُوْا نِعْمَتَ اللّٰهِ كُفْرًا وَّ اَحَلُّوْا قَوْمَهُمْ دَارَ الْبَوَارِ ۙ﴿۲۸﴾

काय आपण त्यांच्याकडे पाहिले नाही, ज्यांनी अल्लाहच्या देणग्यांच्या प्रति कृतघ्नता दर्शविली; आणि आपल्या लोकांना नष्ट होणाऱ्या घरात [२] आणून उतारले. (२८)

جَهَنَّمَ ۚ يَصْلَوْنَهَا ؕ وَبِئْسَ الْقَرَارُ ﴿۲۹﴾

म्हणजे नरकाग्नीत, ज्यात हे सर्व जातील, जी अत्यंत वाईट जागा आहे. (२९)

وَجَعَلُوْا لِلّٰهِ اَنْدَادًا لِّيُضِلُّوْا عَنْ سَبِيْلِهٖ ؕ قُلْ تَمَتَّعُوْا فَاِنَّ مَصِيْرَكُمْ اِلَى النَّارِ ﴿۳۰﴾

आणि त्यांनी अल्लाहचे समकक्ष बनवून घेतले, की लोकांना अल्लाहच्या मार्गापासून बहकवावे. आपण सांगून टाका की, ठीक आहे, मौज मजा करुन घ्या; मग तर तुम्हाला नरकाग्नी कडेच जावयाचे आहे.[३] (३०)

قُلْ لِّعِبَادِیَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا يُقِيْمُوا الصَّلٰوةَ وَيُنْفِقُوْا مِمَّا رَزَقْنٰهُمْ سِرًّا وَّ عَلَانِيَةً مِّنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِیَ يَوْمٌ لَّا بَيْعٌ فِيْهِ وَلَا خِلٰلٌ ﴿۳۱﴾

माझ्या ईमानदार भक्तांना सांगून टाका, की त्यांनी नमाजींना कायम करावे; आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे, त्यातून काही ना काही, गपचिप गपचिप आणि उघडपणे, खर्च करीत रहावे, यापूर्वी की, तो दिवस येऊन पोहचावा, ज्यात न खरेदी विक्री होईल, न मैत्री आणि प्रेम.[४] (३१)

اَللّٰهُ الَّذِیْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ وَاَنْزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً فَاَخْرَجَ بِهٖ مِنَ الثَّمَرٰتِ رِزْقًا لَّكُمْ ۚ وَسَخَّرَ لَكُمُ الْفُلْكَ لِتَجْرِیَ فِی الْبَحْرِ بِاَمْرِهٖ ۚ وَسَخَّرَ لَكُمُ الْاَنْهٰرَ ۚ﴿۳۲﴾

अल्लाह तो आहे, ज्याने आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले. आणि आकाशांतून पाऊस वर्षवून, त्याच्यामार्फत तुमच्या उपजिविकेसाठी, फळे निर्माण केली आहेत, आणि गलबतांना, तुमच्या वशीभूत करुन दिले आहे की, समुद्रांत त्याच्या हुकूमाने, चालावे फिरावे; त्यानेच नद्या पाट तुमच्या अख्त्यारात करुन दिली आहे.[५] (३२)

وَسَخَّرَ لَكُمُ الشَّمْسَ وَالْقَمَرَ دَآئِبَيْنِ ۚ وَسَخَّرَ لَكُمُ الَّيْلَ وَالنَّهَارَ ۚ﴿۳۳﴾

आणि त्यानेच तुमच्यासाठी सूर्याला आणि चंद्र तुमच्या ताब्यात करुन दिले आहे की, बराबर चालत आहेत.[६] आणि रात्रदिवसाला सुध्दा तुमच्या कामात लावून ठेवले आहे. (३३) [७]

وَاٰتٰىكُمْ مِّنْ كُلِّ مَا سَاَلْتُمُوْهُ ؕ وَاِنْ تَعُدُّوْا نِعْمَتَ اللّٰهِ لَا تُحْصُوْهَا ؕ اِنَّ الْاِنْسَانَ لَظَلُوْمٌ كَفَّارٌ ۠﴿۳۴﴾

आणि त्यानेच तुम्हाला, तुम्ही मागितलेल्या सर्व वस्तुमधून तुम्हास देऊन[८] ठेवले आहे, जर तुम्ही अल्लाहच्या उपकारांना मोजू इच्छाल, तर त्यांना पूर्णपणे मोजू पण शकत नाहीत.[९] खचित्‌च माणूस फार मोठा अन्यायी आणि कृतघ्न आहे[१०] (३४)

१) याचे भाष्य हदीसमध्ये अशाप्रकारे येते की, ''मृत्यूनंतर, कबरीमध्ये, मुसलमानाला जेव्हा प्रश्न केला जातो, तर तो उत्तरात या गोष्टीची साक्ष देतो की, अल्लाहच्या शिवाय कोणी उपास्य नाही. आणि मोहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) अल्लाहचे पैगंबर आहेत. बस हाच अर्थ आहे, अल्लाहच्या या फर्मानाचा, ''युसब्बितुल्लाहुल लजीना आमनु'' चा.'' (स. बुखारी स.मुस्लिम) एका आणखी हदीशीत आहे की, ''जेव्हा बंद्याला कबरीमध्ये ठेवून देण्यात येते, आणि त्याचे साथीदार निघून जातात, आणि तो त्यांच्या बुटांचे आवाज ऐकतो त्यावेळी त्याच्याजवळ दोन देवदूत येतात; आणि त्याला उठवून, त्याला विचारतात की, त्या गृहस्थाच्या बाबतीत तुझे काय मत आहे? तो ईमानवाला असेल तर उत्तर देतो कीं, ते अल्लाहचे सेवक आणि त्याचे पैगंबर आहेत. देवदूत त्याला नरकाग्नीचे ठिकाण दाखवतात; आणि म्हणतात कीं, अल्लाहने याच्या जागी, तुझ्या करिता, स्वर्गात ठिकाण बनवून दिले आहे तर तो दोन्ही ठिकाणे पाहतो आणि त्याची कबर सत्तर हात, रूंद करून देण्यांत येते.'' आणि त्याच्या कबरीला, कयामत पर्यंत, टवटवीत आणि हिरवीगार करून देण्यात येते.'' (स. मुस्लिम) एका असर (सहाबांचे कथन) मध्ये आहे, ''त्याला विचारण्यांत येते, मन रब्बुका? मा दीनुका? मन नबीय्युका? तुझा पालनकर्ता कोण आहे? तुझा धर्म काय आहे? आणि तुझा पैगंबर

कोण आहे? मग अल्लाहतआला त्याला दृढ जमवून ठेवतो, आणि तो उत्तर देतो, रब्बी यल्लाह् (माझा पालनकर्ता अल्लाह् आहे.)व दीनल् इस्लाम (माझा धर्म इस्लाम आहे) व नबीय्यीन मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम (आणि माझे पैगंबर मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत)'' – (तफसीर इब्ने कसीर)

२) याचे भाष्य सहीह बुखारी मध्ये आहे की, याच्याने अभिप्रेत मक्केचे काफिर आहेत. (स. बुखारी, तफसीर सू. इब्राहीम) ज्यांनी मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)च्या पैगंबरीला नाकारून, बद्रच्या युध्दात, मुसलमानांशी लढून आपल्या लोकांना गारत करविले; तथापि आपल्या विषयाच्या संदर्भात, हे सार्वत्रिक आहे; आणि अर्थ हा होईल की, ह. मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला अल्लाहतआलाने, 'रहमतुललिल आलमीन', आणि लोकांसाठी, 'अल्लाह्ची देणगी,' बनवून पाठविले. मग ज्याने या देणगीची कदर केली, त्याचा स्वीकार केला; त्याने आभार मानले. तो स्वर्गवाला होऊन गेला. आणि ज्याने या देणगीला रद्द केले, आणि कुफ्र अंगी करून ठेवले, तो नर्कवासी ठरवला गेला.

३) ही धमकी आणि कानउघाडणी आहे की या जगात तुम्ही जे काय इच्छिता करून घ्या! कुठपर्यंत? शेवटी तुमचे ठिकाण तर (जहन्नम) नरकाग्नीच आहे.

४) नमाजीला कायम करण्याचा अर्थ हा आहे की, तिला तिच्या वेळेवर आणि तिचे सर्व मुख्य स्तंभ, हळू हळू आणि व्यवस्थीत, आणि नम्रता आणि व्याकुळते सह, अदा केले जावेत, ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची सुन्नत आहे. इनफाकचा अर्थ आहे की, जकात अदा केली जावीं. नातेवाईकांशी त्यांना जोडणारी चांगली वागणूक दिली जावी. आणि दुसऱ्या गरजवंतावर, उपकार केले जावेत. हे नाही की, फक्त आपला व्यक्तीगत, आपल्या आवश्यकतावर कुठल्याही प्रकारची कमी केल्याशिवाय खर्च केला जावा. आणि अल्लाहतआलाने सांगितलेल्या जागी खर्च करण्यासाठी टाळाटाळ केली जावी. कयामतचा दिवस असा असेल कीं, जेथे न खरेदी विक्री करणे शक्य होईल, न कोणी मैत्री, पण कोणाच्या कामा येईल. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''हे ईमानवाल्यांनो! त्या दिवसाच्या येण्याच्या पूर्वी (अल्लाह्च्या मार्गांत) खर्च करून घ्या. ज्यांत काही खरेदी विक्री होणार नाही; न कोणी मैत्री आणि शिफारसच कामा येईल.'' (सू. बकर: २५४)

५) अल्लाह्तआलाने सृष्टीला जी बक्षीसे दिली, त्यातूंन काहींची येथे चर्चा केली जात आहे. फर्माविले आकाशाला छत आणि पृथ्वीला आंथरूण बनविले. आकाशातून पाऊस पाडून, वेगवेगळ्या प्रकारचे वृक्ष, आणि पिके उगविली. ज्यात लज्जती आणि शक्तीसाठी मेवे आणि फळे पण आहेत. आणि नाना प्रकारची धान्ये पण ज्यांचे रंग आणि स्वरूपे पण एक दुसऱ्यापासून भिन्न आहेत. आणि चवी, सुवास आणि फायदे पण वेगवेगळे आहेत. नावा आणि जहाजांना सेवेत लावून दिले; की ते उसळणाऱ्या लाटांवर चालतात. माणसांना पण एका देशांतून दुसऱ्या देशात पोहचवितात. आणि व्यापारी माल पण, एका जागेहून दुसऱ्या जागी हलवतात. जमीन आणि डोंगरातून झरे वाहवून दिलेत, कारण की तुम्हीही तृप्त व्हा आणिआपल्या शेतांना पण तृप्त करा.

६) म्हणजे नित्य चालत राहतात; कधी थांबत नाहीत ना रात्री ना दिवसा. याच्या शिवाय एक दुसऱ्याच्या मागे चालतात; परंतु कधी सुध्दा त्यांची आपसात टक्कर होत नाही.

७) रात्र आणि दिवस, यांचे आपसातील अंतर कायम राहते. कधी रात्री दिवसाचा काही भाग घेऊन, मोठी होऊन जाते; आणि कधी दिवस, रात्रीचा काही भाग घेऊन मोठा होऊन जातो. आणि हा क्रम विश्वाच्या निर्मिती पासून चालू आहे. यांच्यात कधीही बदल झाला नाही.

८) म्हणजे त्याने तुमच्या आवश्यकतेच्या सर्व वस्तू उपलब्ध करून दिल्यात; जे तुम्ही त्याच्याजवळ मागतात. ते पण देतो, आणि जे नाही मांगतात ते पण देतो. सारांश, तुम्हास जीवन घालवण्यासाठी, सर्व सवलती उपलब्ध करून देतो.

९) म्हणजे अल्लाह्च्या देणग्या असंख्य आहेत. कोणी त्यांची मोजदादच करू शकत नाही. कोणी या देणग्यांच्या आभाराचा हक्क अदा करू शकत नाही? एका, सहाबाच्या कथनात, ह. दाऊद عليه السلام. चे म्हणणे मांडण्यात आले आहे, त्यांनी म्हटले, ''हे माझ्या पालनकर्त्या! मी तुझे आभार कशा प्रकारे मानावेत? कारण आभार (मानणे) स्वत:च, तुझ्याकडून माझ्यावर एक देणगी आहे!'' अल्लाह्तआलाने म्हटले, '' हे दाऊद! आता तू माझे आभार मानून टाकलेत. कारण की तू मान्य करून टाकले की हे अल्लाह् मी तुझ्या देणग्यांचे आभार मानण्यास असमर्थ आहे.'' (तफसीर इब्ने कसीर)

१०) अल्लाह्च्या देणग्यावर आभार मानण्यात आळस केल्यामुळे, मनुष्य आपल्या जिवावर, जुलूम आणि अन्याय करतो; विशेषत: काफिर, जो अल्लाह् कडून पूर्ण पणे गाफील आहे.

وَاِذْ قَالَ اِبْرٰهِيْمُ رَبِّ اجْعَلْ هٰذَا الْبَلَدَ اٰمِنًا وَّاجْنُبْنِيْ وَبَنِيَّ اَنْ نَّعْبُدَ الْاَصْنَامَ ﴿٣٥﴾

**(इब्राहीमची! ही दुआ पण लक्षात असावी.) जेव्हा इब्राहीमने म्हटले की, हे माझ्या पालनकर्त्या! या शहराला शांती वाले (स्थळ) बनवून दे.[१] आणि मला आणि माझ्या संततीला मूर्तीपुजेपासून, आपल्या आश्रयांत घे.** 35

رَبِّ اِنَّهُنَّ اَضْلَلْنَ كَثِيْرًا مِّنَ النَّاسِ ۚ فَمَنْ تَبِعَنِيْ فَاِنَّهٗ مِنِّيْ ۚ وَمَنْ عَصَانِيْ فَاِنَّكَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٣٦﴾

**हे मला पाळणाऱ्या उपास्या! त्यांनी पुष्कळशा लोकांना (सन) मार्गाहून बहकवून[२] दिले आहे. मग माझे आज्ञापालन करणारा, माझा आहे; आणि जो माझा आज्ञाभंग करेल, तर तू फारच क्षमाकर्ता आणि दयाळू आहेस.** 36

رَبَّنَآ اِنِّيْٓ اَسْكَنْتُ مِنْ ذُرِّيَّتِيْ بِوَادٍ غَيْرِ ذِيْ زَرْعٍ عِنْدَ بَيْتِكَ الْمُحَرَّمِ ۙ رَبَّنَا لِيُقِيْمُوا الصَّلٰوةَ فَاجْعَلْ اَفْـِٕدَةً مِّنَ النَّاسِ تَهْوِيْٓ اِلَيْهِمْ وَارْزُقْهُمْ مِّنَ الثَّمَرٰتِ لَعَلَّهُمْ يَشْكُرُوْنَ ﴿٣٧﴾

**हे आमच्या पालनकर्त्या! मी आपली काही संतती,[३] ज्या ठिकाणी काही शेती माती नाही अशा जंगलात, तुझे सन्माननीय घराजवळ, आणून वसविली आहे. हे आमच्या पालनकर्त्या! हे यासाठी की, त्यांनी नमाजीला कायम करावे;[४] आता तू काही लोकांची[५] मने, यांच्याकडे वळवून दे. आणि त्यांना फळफळावलांची उपजिविका प्रदान कर;[६] कारण की, त्यांनी तुझे आभार मानवेत.** 37

رَبَّنَآ اِنَّكَ تَعْلَمُ مَا نُخْفِيْ وَمَا نُعْلِنُ ۭ وَمَا يَخْفٰى عَلَى اللّٰهِ مِنْ شَيْءٍ فِي الْاَرْضِ وَلَا فِي السَّمَاۗءِ ﴿٣٨﴾

**हे आमच्या पालनकर्त्या तुला फार चांगल्या प्रकारे ठाऊक आहे, जे आम्ही लपवितो आणि जे उघड करतो. पृथ्वी आणि आकाशांतील कोणतीही वस्तू, अल्लाहू वर गुप्त नाही.[७]** 38

१) या शहराने अभिप्रेत मक्का आहे. दुसऱ्या दुआच्या पहिले, ही दुआ केली की, त्याला अभय स्थान बनवून दे. या साठी की अभय असेल, तर लोक दुसऱ्या देणग्यापासून सुध्दा खऱ्या अर्थाने लाभान्वयीत होऊ शकतील. नाहीतर अभय आणि शांतीशिवाय, सर्व सुखसोयी असूनसुध्दा, भीती आणि दहशतच्या सावल्या माणसाला भयभित आणि परेशान करतात.जसे आजकालच्या समाजाची अवस्था आहे, फक्त सौदी अरब शिवाय. तेथे या दुआच्या बरकतीने, आणि इस्लामच्या मर्यादा लागू केल्याने, आजपण एक उदाहरणाचा अभय आणि शांतीचा नमुना कायम आहे. येथे अल्लाहच्या देणग्यांच्या अंतर्गत त्याला वर्णन करुन, इशारा करुन दिला की, कुरैश, जेथे अल्लाहच्या दुसऱ्या देणग्याकडून, गाफील आहेत, या विशेष बक्षिसाकडूनपण गाफील आहेत की त्याने त्यांना, मक्केसारख्या अभय शहराचे राहणारे बनविले.

२) मार्गभ्रष्ट करण्याचा संबंध, या दगडांच्यामूर्तीकडे केला, ज्यांची मुशरिकीन भक्ती करीत असत. यावर सुध्दा की, त्यांना काही अक्कल नाही, कारण की, त्या मार्ग भ्रष्टतेलाकारणीभूत होत्या आणि आहेत.

३) असे म्हणतात की, ह. इबाहीम عليه السلام. ला आठ आपले सख्खे पुत्र होते. ज्यांच्यातून फक्त इस्माईल عليه السلام. ला येथे बसविले (फत्हूल कदीर.)

४) उपासनांमध्ये, फक्त नमाजचा उल्लेख केला. ज्यामुळे, नमाजीचे महत्त्व, स्पष्ट होते.

५) (काही लोक) याच्याने अभिप्रेत मुसलमान आहेत. म्हणून पाहून घ्या की, कशाप्रकारे साऱ्या जगातील मुसलमान, मक्का मुकर्रमा मध्ये जमा होतात. आणि हज शिवाय सुध्दा, संपूर्ण वर्ष, हा क्रम चालू असतो. जर ह. इब्राहीम عليه السلام. 'अफईदतन् नास' (लोकांची मने) म्हणते तर, ख्रिस्ती, यहूदी, अग्नीपुजक, आणि दुसरे सर्व लोक, मक्केला पोहंचते,. 'मिनन् नास्'च्या 'मिन्'ने या दुआला मुसलमानांपुरते मर्यादित करून दिले. (इब्ने कसीर)

६) या दुआचा परिणाम पण पाहून घ्यावा की मक्केसारख्या, निर्जल आणि रेताड जमिनीमध्ये, जेथे कोणी फळ देणारा वृक्ष नाही; दुनिया भरची फळफळावळ फारच मुबलकतेने उपलब्ध आहेत. आणि हजच्या प्रसंगी जेव्हा की लाखों माणसे, आणखी तेथे पोहचून जातात; फळांच्या मुबलकतेत काही कमी पडत नाही. असे सांगण्यात येते की, ही दुआ, खाना-ए-काबाच्या बांधल्यानंतर, मागितली. जेव्हा की पहली दुआ(अभय स्थान बनवू दे)त्यावेळीं, मागितली, जेव्हा आपली पत्नी, आणि स्तनपान करणारे मुल, इस्माईलला, हुकूमाने, तेथे सोडून चालले गेले. (इब्ने कसीर)

७) अर्थ हा आहे कीं माझ्या दुआच्या उद्देश्याला तू फार चांगल्याप्रकारे जाणतोस. या शहरवाल्यांसाठी दुआने मूळ उद्देश्य तुझी प्रसन्नता आहे. तू तर प्रत्येक वस्तुच्या हकीकतीशीं खूप वाकबगार आहेस. आकाश आणि पृथ्वीची कोणी वस्तू तुझ्यापासून गुप्त नाही.

الْحَمْدُ لِلَّهِ الَّذِي وَهَبَ لِي عَلَى الْكِبَرِ إِسْمَاعِيلَ وَإِسْحَاقَ ۚ إِنَّ رَبِّي لَسَمِيعُ الدُّعَاءِ ﴿٣٩﴾

**अल्लाहचा आभार आहे की, ज्याने मला या म्हातारपणात, इस्माईल आणि इस्हाक प्रदान केलेत. याच्यात काही संशय नाही कीं माझा पालनकर्ता अल्लाह् दुआंचा ऐकणारा आहे. (३९)**

رَبِّ اجْعَلْنِي مُقِيمَ الصَّلَاةِ وَمِن ذُرِّيَّتِي ۚ رَبَّنَا وَتَقَبَّلْ دُعَاءِ ﴿٤٠﴾

**हे माझ्या पालनकर्त्या! मला नमाजीवर कायम ठेव आणि माझ्या संततीतून सुध्दा.[६] हे आमच्या पालनकर्त्या! माझी दुआ कबूल कर (४०)**

رَبَّنَا اغْفِرْ لِي وَلِوَالِدَيَّ وَلِلْمُؤْمِنِينَ يَوْمَ يَقُومُ الْحِسَابُ ﴿٤١﴾ ع ٦ / ١٨

**हे माझ्या पालनकर्त्या! मला क्षमा कर[७] आणि माझ्या मातापित्यांनापण क्षमा कर आणि दुसऱ्या ईमानवाल्यांना पण क्षमा कर, ज्यावेळी हिशेब घेतला जाईल. (४१)**

وَلَا تَحْسَبَنَّ اللَّهَ غَافِلًا عَمَّا يَعْمَلُ الظَّالِمُونَ ۚ إِنَّمَا يُؤَخِّرُهُمْ لِيَوْمٍ تَشْخَصُ فِيهِ الْأَبْصَارُ ﴿٤٢﴾

**आणि अन्यायी लोकांच्या कर्मांपासून अल्लाह्ला अजाण समजू नकोस, तो तर त्यांना त्या दिवसापर्यंत सवलत देऊन आहे ज्या दिवशी, डोळे उघडेचे उघडेच राहून जातील.[१] (४२)**

مُهْطِعِينَ مُقْنِعِي رُءُوسِهِمْ لَا يَرْتَدُّ إِلَيْهِمْ طَرْفُهُمْ ۖ وَأَفْئِدَتُهُمْ هَوَاءٌ ﴿٤٣﴾

**ते आपली डोके वर उचलून, धावपळ करीत असतील.[२] स्वत: आपल्याकडे पण, त्यांच्या नजरा वळणार नाहीत. आणि त्यांची मने उडालेली रिक्त असतील[३] (४३)**

وَأَنذِرِ النَّاسَ يَوْمَ يَأْتِيهِمُ الْعَذَابُ فَيَقُولُ الَّذِينَ ظَلَمُوا رَبَّنَا أَخِّرْنَا إِلَىٰ أَجَلٍ قَرِيبٍ نُّجِبْ دَعْوَتَكَ وَنَتَّبِعِ الرُّسُلَ ۗ أَوَلَمْ تَكُونُوا أَقْسَمْتُم مِّن قَبْلُ مَا لَكُم مِّن زَوَالٍ ﴿٤٤﴾

**आणि लोकांना या दिवसापासून सावध करून दे; जेव्हा की, त्यांच्याजवळ शिक्षा येऊन ठेपेल; आणि जुलुमी म्हणतील की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास फार थोड्या नजीकच्या वेळेपर्यंत अवकाश दे, कीं, आम्ही तुझ्या आवाहनाला कबूल करून घ्यावे. आणि तुझ्या पैगंबराच्या आज्ञापालनात लागून जावे; काय तुम्ही याच्यापूर्वीपण शपथा खात नसत? की, तुमच्यासाठी या जगातून जाणेही नाहींच.[४] (४४)**

१) आपल्या बरोबर आपल्या संततीसाठी पण दुआ मागितली. जसे याच्यापूर्वी पण आपल्या बरोबर, आपल्या संततीसाठी ही दुआ मागितली की, त्यांना दगडांच्या मूर्तींची पुजा करण्यापासून वाचवून ठेव. ज्यामुळे हे ठाऊक झाले की, अल्लाहच्या धर्माच्या आवाहकांना, आपल्या घरवाल्यांची हिदायत, आणि त्यांचे धार्मिक शिक्षण व संवर्धन, पासून गाफील रहावयास नको . किंबहुना प्रचार आणि आवाहानांत त्यांना प्रथमता दिली पाहिजे. जसे कीं अल्लाहतआलाने, आपले शेवटचे पैगंबर, हजरत मोहम्मद ﷺ ला पण हुकूम दिला, ''आपल्या जवळच्या नातेवाईकांना भिववा!''(सू.शूअरा-२१४)

२) ह. इब्राहीम عليه السلام.नी ही दुआ त्यावेळी केली, जेव्हा कीं अद्यापपर्यंत, त्यांच्यावर आपल्या बापाचे ''अल्लाहचे शत्रू'' होणे स्पष्ट झाले नव्हते; जेव्हा हे स्पष्ट होऊन गेले कीं, माझा बाप अल्लाह्चा शत्रू आहे, तर त्याच्यापासून अलिप्त झाल्याचे जाहीर करून टाकले. यासाठी की, मुशरिकीन साठी, क्षमेची प्रार्थना करणे योग्य नाहीं; मग तो जरी अगदी जवळचा नातेवाईक का असेना!

३) म्हणजे कयामतच्या भयानकतेमुळे, जर जगात, अल्लाहने जर कोणाला जास्त अवकाश देऊन दिला, आणि त्याच्या मृत्युपर्यंत त्याची पकड केली नाही, तर कयामतच्या दिवशी तो अल्लाहच्या पकडीपासून, वाचू शकणार नाहीं, जो काफिरांसाठी इतका भयानक दिवस असेल की, डोळे उघडेच्या उघडे राहून जातील.

४) 'मुहतिअीन', जोराने पळत असतील.दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''बोलविणाऱ्याकडे पळतील.''(सू.कमर-८). ''आश्चर्याने त्यांची डोकी वर उचललेली असतील.''(मुकनिईरूअुसुहिम'')

५) जी भयानकता ते पाहतील, आणि जी काळजी आणि भीती त्यांना आपल्या बाबतीत वाटेल, याला डोळ्यापुढे ठेवून, त्यांचे डोळे एका क्षणापुरते देखील, खाली लवणार नाही आणि अतिभयाने, त्यांने मन धास्तावलेले आणि रिक्त असेल.

६) म्हणजे जगात शपथा खाऊन खाऊन सांगत होते की, कोणी हिशेब टिशेब, आणि स्वर्ग आणि नर्क नाही. आणि दुसऱ्यादा कोणाला जीवंत होणे आहे?

وَسَكَنتُمْ فِى مَسَٰكِنِ ٱلَّذِينَ ظَلَمُوٓا۟ أَنفُسَهُمْ وَتَبَيَّنَ لَكُمْ كَيْفَ فَعَلْنَا بِهِمْ وَضَرَبْنَا لَكُمُ ٱلْأَمْثَالَ ﴿٤٥﴾

आणि काय तुम्ही त्या लोकांच्या घरात रहात वसत नसत, ज्यांनी आपल्या जीवांवर जुलुम केला? आणि काय तुमच्यावर तो मामला उघड झाला नाही, की आम्ही त्यांचे बरोबर कसे काय केले? आम्ही तर (तुमच्या समजविण्यासाठीं) पुष्कळशी उदाहरणे वर्णन करून दिली होती.[१] ४५

وَقَدْ مَكَرُوا۟ مَكْرَهُمْ وَعِندَ ٱللَّهِ مَكْرُهُمْ وَإِن كَانَ مَكْرُهُمْ لِتَزُولَ مِنْهُ ٱلْجِبَالُ ﴿٤٦﴾

आणि या आपल्या चाली चालतच आहेत; आणि अल्लाह्ला यांच्या तमाम चालींचे ज्ञान आहे;[२] आणि यांच्या चाली अशा नव्हत्या की, त्यांच्याने पर्वत, आपल्या जागेवरून हटून जातील.[३] ४६

فَلَا تَحْسَبَنَّ ٱللَّهَ مُخْلِفَ وَعْدِهِۦ رُسُلَهُۥٓ ۗ إِنَّ ٱللَّهَ عَزِيزٌ ذُو ٱنتِقَامٍ ﴿٤٧﴾

आपण कधीच असा विचार करू नका की, अल्लाह् आपल्या पैगंबरांशी वायद्याच्या विरूध्द करेल.[४] अल्लाह् फारच प्रबळ आणि बदला घेणारा आहे.[५] ४७

يَوْمَ تُبَدَّلُ ٱلْأَرْضُ غَيْرَ ٱلْأَرْضِ وَٱلسَّمَٰوَٰتُ ۖ وَبَرَزُوا۟ لِلَّهِ ٱلْوَٰحِدِ ٱلْقَهَّارِ ﴿٤٨﴾

ज्यादिवशी पृथ्वी, या पृथ्वी पेक्षा, आणखी काही बदलून दिली जाईल, आणि आकाश[६] सुध्दा. आणि सर्वच्या सर्व लोक एकाच महाप्रबळ अल्लाह्समोर उभे राहतील. ४८

وَتَرَى ٱلْمُجْرِمِينَ يَوْمَئِذٍ مُّقَرَّنِينَ فِى ٱلْأَصْفَادِ ﴿٤٩﴾

आणि आपण त्यादिवशी गुन्हेगारांना पाहाल, साखळदंडाने, एक दुसऱ्याशी, एका जागी जखडलेले असतील. ४९

سَرَابِيلُهُم مِّن قَطِرَانٍ وَتَغْشَىٰ وُجُوهَهُمُ ٱلنَّارُ ﴿٥٠﴾

त्यांचे पोषाख गंधकाचे असतील,[७] आणि आग त्यांच्या चेहऱ्यावर चढलेली असेल. ५०

لِيَجْزِىَ ٱللَّهُ كُلَّ نَفْسٍ مَّا كَسَبَتْ ۚ إِنَّ ٱللَّهَ سَرِيعُ ٱلْحِسَابِ ﴿٥١﴾

हे यासाठी की, अल्लाह्तआलाने, प्रत्येक माणसाला त्याच्या कर्मांचा बदला द्यावा. नि:संशय, अल्लाह्तआलाला, हिशेब घेण्याला काहीच वेळ लागत नाही. ५१

هَٰذَا بَلَٰغٌ لِّلنَّاسِ وَلِيُنذَرُوا۟ بِهِۦ وَلِيَعْلَمُوٓا۟ أَنَّمَا هُوَ إِلَٰهٌ وَٰحِدٌ وَلِيَذَّكَّرَ أُو۟لُوا۟ ٱلْأَلْبَٰبِ ﴿٥٢﴾ ع

हे (कुरआन)[८] सर्व लोकांसाठी, (एक पूर्ण) संदेश आहे. याच्याने त्यांना सावध करून दिले जावे, आणि (त्यांनी) चागंल्याप्रकारे जाणून घ्यावे, की अल्लाह् एकच उपास्य आहे. आणि म्हणून बुध्दीमंत लोकांनी (याला) समजून उमजून घ्यावे. ५२

(७ ऊ ११ ११)







الٓر ۚ تِلْكَ ءَايَٰتُ ٱلْكِتَٰبِ وَقُرْءَانٍ مُّبِينٍ ﴿١﴾

अलिफ लाम रा, ही अल्लाहच्या पुस्तकाची महावांक्ये आहेत; आणि स्पष्ट आणि तेजस्वी कुरआनाची. १

१) म्हणजे बोध घेण्यासाठी तर आम्ही, त्या मागच्या लोकांच्या घटना, वर्णन करून सांगितल्या आहेत; ज्यांच्या घरांत, तुम्ही आता वस्ती करून आहात आणि त्यांचे भग्नावशेष सुध्दा, तुम्हाला, चिंतन आणि मनन करण्याचे आवाहन करीत आहेत.जर तुम्ही याच्यापासून धडा न घेतला, आणि त्यांच्या परिणामा पासून वांचण्याची काळजी घेतली नाहीं, तर तुमची मर्जी. मग तुम्ही सुध्दांअशा परिणामा करितां तयार रहा.

२) हे वाक्य वर्तमानकालीन आहे; की आम्ही त्यांच्या बरोबर जे केले ते केले. वास्तविक पाहता त्यांनी असत्याला गोंजारले आणि सत्याला रद्द करण्यासाठी, आपल्या कुवतीनुसार डावपेच केले. आणि अल्लाहला त्या सर्व चालींचे ज्ञान आहे. म्हणजे त्याच्यापाशी अंकित आहे. ज्याचा तो त्यांना बदला देईल.

३) कारण की जर पर्वत जागेवरून हटून गेले असते तर आपल्या जागेवर स्थिर न राहते; जेव्हा की सर्व पर्वत आपआपल्या जागी स्थिर आणि कायम आहेत. म्हणजे खचित्च यांचे डावपेच तर इतके मोठे होते की, पर्वत पण आपल्या जागेवरून हलून गेले असते; हा तर अल्लाहतआलाच आहे, ज्याने त्यांच्या डावपेचांना यशस्वी होऊ दिले नाही. जसे मुशरिकीनच्या शिर्कच्या बाबतीत अल्लाह्तआलाने फर्माविले, '' नजिक आहे की, (अशा म्हणण्यामुळे) आकाश फाटून जावे आणि जमीन दुभंगून जावी; आणि पर्वत कण कण होऊन जावेत; या गोष्टीवर की, त्यांनी म्हटले अल्लाह रहमानची संतती आहे.(सू. मर्यम - ९०-९१)

४) म्हणजे अल्लाहत्आलाने आपल्या पैगंबरांशी, इहलोकात आणि परलोकात मदत करण्याचा जो वायदा केलेला आहे, तो नक्कीच खरा आहे. त्याच्याने वायद्याच्या विरुध्द करणे शक्य नाही.

५) म्हणजे आपल्या मित्राकरिता, आपल्या शत्रुंकडून बदला घेणारा आहे.

६) इमाम शौकानी म्हणतात, या महावाक्यात दोन्ही शक्यता आहेत, की हे वैशिष्टच बदलण्याच्या दृष्टीने असावे किंवा खुद्द बदलण्याच्या दृष्टीने. म्हणजे हे आकाश आणि पृथ्वी, आपल्या वैशिष्टयाच्या अनुषंगाने बदलून जातील; किंवा तशीच त्यांच्या वैयक्तिकअनुषंगाने बदल होईल.न ही पृथ्वी राहील न आकाश. पृथ्वी कोणी दुसरीच असेल, आणि आकाशपण कोणी दुसरेच. हदीसमध्ये येते, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''कयामतच्या दिवशी लोक पांढऱ्या भुऱ्या जमिनीवर उभे असतील, जी मैद्याच्या पोळी प्रमाणे असेल; यांच्यात कोणाचे काही निशाण (झेंडा) (किंवा ओळखण्याचे निशाण) असणार नाही.'' ह. आयेशा ﵂. नी विचारले की, जेव्हा हे आकाश आणि पृथ्वी बदलून दिले जातील, तर लोक त्या दिवशी कोठे असतील?'' नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, 'सिरातवर' 'म्हणजे ''पुलसिरातवर.'' एका यहूद्याच्या चौकशीवर आपण (सल्ल.) नी फर्माविले की, ''लोक त्या दिवशी पुलसिरातजवळ अंधारात असतील. (स. मुस्लिम)

७) जे आगीने लगेच भडकून उठते. याशिवाय आगीने त्यांच्या चेहऱ्याला पण झाकलेले असेल. हा इशारा कुरआनाकडे आहे, किंवा मागच्या तपशिलाकडे आहे, जे ''वला तह्सबन्नल्लाह गाफिलन्'' ने वर्णन करण्यात आले आहे.

८) पुस्तक आणि कुरआन मुबीनने अभिप्रेत, कुरआन करीमच आहे, जे नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर अवतरीत झाले. ज्याप्रमाणे, ''कद् जाअकुम् मिनल्लाही नुरुन व किताबूम् मुबीन.'' (सू.माईदः १५) मध्ये प्रकाश आणि पुस्तक दोघांनी अभिप्रेत, कुरआन करीमच आहे.

رُبَمَا يَوَدُّ الَّذِينَ كَفَرُوا لَوْ كَانُوا مُسْلِمِينَ ②

एक अशी पण वेळ येईल, की काफिर आपल्या मुसलमान होण्याची आकांक्षा करतील[१] ②

ذَرْهُمْ يَأْكُلُوا وَيَتَمَتَّعُوا وَيُلْهِهِمُ الْأَمَلُ فَسَوْفَ يَعْلَمُونَ ③

आपण त्यांना खाणे (पिणे), नफा घेतांना, आणि आशेत व्यस्त असतांना, सोडून द्या. (लवकरच) हे स्वत: आता जाणून घेतील[२] ③

وَمَا أَهْلَكْنَا مِنْ قَرْيَةٍ إِلَّا وَلَهَا كِتَابٌ مَعْلُومٌ ④

आणि कोण्या वस्तीला आम्ही नष्ट केले नाही परंतु हे की तिच्यासाठी एक निश्चित काळ लिहिला जाऊन चुकला होता ④

مَا تَسْبِقُ مِنْ أُمَّةٍ أَجَلَهَا وَمَا يَسْتَأْخِرُونَ ⑤

कोणी समूह आपल्या मृत्यूच्या न पुढे चालतो, न मागे राहतो[३] ⑤

وَقَالُوا يَا أَيُّهَا الَّذِي نُزِّلَ عَلَيْهِ الذِّكْرُ إِنَّكَ لَمَجْنُونٌ ⑥

आणि त्यांनी म्हटले की, हे त्या माणसा! ज्यावर कुरआन उतारण्यात आले आहे, खचित्‌च तू तर वेडा आहेस ⑥

لَوْ مَا تَأْتِينَا بِالْمَلَائِكَةِ إِنْ كُنْتَ مِنَ الصَّادِقِينَ ⑦

जर तू खराच आहेस, तर आमच्याजवळ देवदुतांना का आणत नाहीस[४]? ⑦

مَا نُنَزِّلُ الْمَلَائِكَةَ إِلَّا بِالْحَقِّ وَمَا كَانُوا إِذًا مُنْظَرِينَ ⑧

आम्ही देवदूतांना सत्याबरोबरच अवतरीत करीत असतो; आणि त्यावेळी त्यांना अवकाश दिला जात नाही[५] ⑧

إِنَّا نَحْنُ نَزَّلْنَا الذِّكْرَ وَإِنَّا لَهُ لَحَافِظُونَ ⑨

नि:संशय आम्हीच या कुरआनाला अवतरीत केले आहे. आणि आम्हीच त्याचे संरक्षणकर्ते आहोत[६] ⑨

وَلَقَدْ أَرْسَلْنَا مِنْ قَبْلِكَ فِي شِيَعِ الْأَوَّلِينَ ⑩

आणि आम्ही पूर्वीच्या जनसमूहामध्ये सुद्धा आपले पैगंबर बरोबर पाठविले ⑩

وَمَا يَأْتِيهِمْ مِنْ رَسُولٍ إِلَّا كَانُوا بِهِ يَسْتَهْزِئُونَ ⑪

आणि (परंतु) जो पण पैगंबर आला, त्यांनी त्याची थट्टा केली[७] ⑪

كَذَٰلِكَ نَسْلُكُهُ فِي قُلُوبِ الْمُجْرِمِينَ ⑫

गुन्हेगारांच्या मनांत, आम्ही अशाच प्रकारे हेंच रचून देत असतो[८] ⑫

لَا يُؤْمِنُونَ بِهِ وَقَدْ خَلَتْ سُنَّةُ الْأَوَّلِينَ ⑬

ते त्याच्यावर ईमान आणत नाहीत, आणि खचित्‌च पूर्वी (लोका) ची ही पद्धत चालत आली आहे[९]. ⑬

وَلَوْ فَتَحْنَا عَلَيْهِمْ بَابًا مِنَ السَّمَاءِ فَظَلُّوا فِيهِ يَعْرُجُونَ ⑭

आणि जर आम्ही त्यांच्यावर आकाशाचा दरवाजा उघडून देऊ, हे तेथे चढूपण लागतील ⑭

لَقَالُوا إِنَّمَا سُكِّرَتْ أَبْصَارُنَا بَلْ نَحْنُ قَوْمٌ مَسْحُورُونَ ⑮

तेव्हा सुद्धा हेच म्हणतील की, आमच्यावर नजरबंदी करून टाकण्यात आली आहे; किंबहुना आम्हा लोकावर जादू, करून देण्यात आला आहे[१०] ⑮

وَلَقَدْ جَعَلْنَا فِي السَّمَاءِ بُرُوجًا وَزَيَّنَّاهَا لِلنَّاظِرِينَ ⑯

आणि खचित्‌च आम्ही आकाशात राशी बनविल्या आहेत[११]आणि पाहणाऱ्यासाठी त्याला सुशोभित केले आहे ⑯

१) ही आकांक्षा केव्हा करतील? मृत्यूच्या वेळी; जेव्हा देवदूत त्यांना नर्काची आग दाखवित असतील. किंवा जेव्हा नरकाग्नीत चालले जातील. किंवा त्यावेळी, जेव्हा गुन्हेगार, ईमानदारांना काही काळ, शिक्षा म्हणून, नरकाग्नीत पाहिल्यानंतर, नरकाग्नीतून काढण्यात येईल, किंवा हशरच्या मैदानांत, जेथे हिशोब केला जात असेल, आणि काफिर पाहतील की, मुसलमान स्वर्गांत जात आहेत, तर आकांक्षा करतील की अरेरे! आम्ही पण मुसलमान असतो (तर किती बरे झाले असते) 'रुबमा' मुळांत तर अधिक्यांकरीता आहे. परंतु कधी, कमतरते करता सुद्धा उपयोगात आणला जातो. काही म्हणतात की, त्यांच्याकडून ही आकांक्षा प्रत्येक प्रसंगी केली जाईल. परंतु त्याचा त्यांना काही उपयोग होणार नाही.

२) ही धमकी आणि कानउघाडणी आहे की, हे काफिर आणि मुशरिक, आपल्या कुफ्र आणि शिर्कने परावृत्त होत नाही तर, त्यांना सोडून द्या. त्यांनी दुनियेची मजा लुटून घ्यावी. आणि आपल्या आशा पुऱ्या करून घ्याव्यात. लवकरच त्यांना आपल्या कुफ्र आणि शिर्कचा परिणाम ठाऊक होऊन जाईल.

३) ज्या वस्तीला आज्ञाभंगाच्या कारणाने नष्ट करतात; तर लगेच नष्ट करीत नाही. किंबहुना आम्ही एक वेळ निश्चित केलेला असतो. त्या वेळेपर्यंत त्या वस्तीवाल्यांना अवकाश देऊन दिला जातो. परंतु जेव्हा ती निश्चित वेळ येऊन ठेपते, तेव्हा त्यांना नष्ट करून टाकण्यात येते. मग ते त्याच्या मागे किंवा पुढे होत नाहीत.
४) हे काफिरांच्या कुफ्र आणि अंहकाराचे वर्णन आहे; की ते नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला वेडा म्हणत; आणि म्हणत की, जर तू (हे मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) खरा आहेस, तर आपल्या अल्लाहला सांग की, त्याने आमच्याजवळ देवदूत पाठवावेत, कारण की, त्यांनी तुझ्या पैगंबरीचे समर्थन करावे; किंवा आम्हाला गारत करून टाकावे.
५) अल्लाहतआलाने फर्माविले की, आम्ही देवदूत सत्य निर्णयासाठीच पाठवतो. म्हणजे जेव्हा आमचे प्रयोजन आणि मर्जी, शिक्षा पाठविण्याला अनुकुल असते, तेव्हामग देवदुतांचे अवतरण होते. आणि मग त्यांना अवकाश दिला जात नाही, लगेच, गारत करून टाकण्यात येते.
६) म्हणजे याला हेरफेर आणि बदल करण्याने, वांचविणे हे आमचे काम आहे. म्हणून कुरआन आजपर्यंत, अशाचप्रकारे सुरक्षित आहे, ज्या प्रमाणे ते अवतरीत झाले होते. मार्गभ्रष्ट पंथ, आपआपल्या मार्गभ्रष्ट श्रद्धांना, सिद्ध करण्यासाठी, त्याच्या महावाक्यात, अर्थाच्या दृष्टीने तर फेरफार करीत असतात, आणि आजपण करीत आहे, परंतु मागील पुस्तकांप्रमाणे हे शाब्दिक हेरफेर आणि बदलाने सुरक्षित आहे. याशिवाय सत्यवार्दीचा एक समूह, अर्थाच्या फेरबदलाचा पर्दा फाडण्यासाठी, प्रत्येक काळात आढळून येतो; जो यांच्या मार्गभ्रष्ट श्रद्धाचे आणि चुकीच्या आधारांचे ताणेबाणे, उध्वस्त करीत राहतो. आणि आजही तो या विषयावर कार्य करीत आहे. याशिवाय कुरआनाला येथे 'जिक्र' (बोध) च्या शब्दाने उल्लेखीत करण्यात आले आहे. ज्याने हे ठाऊक होते की, कुरआन करीमचे तमाम दुनियावाल्यांसाठी, 'जिक्र' (स्मरण आणि बोध होण्याकरीता) च्या अनुषंगाने नबी (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)च्या चारित्र्याची ठसठसीत रेखाटणे, आणि आपल्या आदेशांना पण सुरक्षित करून, कयामतपर्यंत बाकी ठेवण्यात आले आहे. जणू कुरआन करीम आणि नबी ﷺ चे चारित्र्याच्या हवाल्याने, लोकांना इस्लामचे आमंत्रण देण्याचा मार्ग, नेहमी करीतां, मोकळा आहे. ही प्रतिष्ठा आणि सुरक्षितेचे स्थान मागच्या कुठल्याही पुस्तकाला, आणि पैगंबराला मिळालेले नाही.
७) ही जणू, नबी (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)ला सांत्वना दिली जात आहे. की फक्त तुम्हालाच खोटे ठरविण्यात आलेले नाही; प्रत्येक पैगंबराबरोबर त्याच्या समाजाने असाच व्यवहार केलेला आहे.
८) म्हणजे कुफ्र आणि पैगंबराची थट्टा मस्करी, आम्ही अपराध्यांच्या मनांत टाकून देतो; किंवा रचून देतो. हा संबंध अल्लाहने आपल्याकडे यासाठी केला की, प्रत्येक वस्तूंचा सृष्टीकर्ता अल्लाहच आहे. जरी त्यांचे हे कर्म, त्यांच्या कायम गुन्हेगारी प्रवृत्तिच्या परिणामांत, अल्लाहच्या मर्जीने दृष्टीगोचर झाले.
९) म्हणजे त्यांना गारद करण्याची तीच पद्धत आहे, जी अल्लाहतआलाने पहिल्या पासून निश्चित करून ठेवली आहे. की खोटे ठरविणे आणि थट्टा मस्करी नंतर, तो समाजांना गारद करीत आलेला आहे. किंवा याच्याने अभिप्रेत, अल्लाहची ती जुनी पद्धत आहे, जिच्यामार्फत तो, अपराध्यांच्या मनांत, कुफ्र आणि शिर्क दाखल करीत आलेला आहे.
१०) म्हणजे त्यांचा कुफ्र व अहंकार, या मर्यादेपर्यंत वाढला आहे की, देवदुतांचे उतरणे तर राहिले एकीकडे, जर स्वत: त्यांच्यासाठी, आकाशाचे दरवाजे उघडून दिले जातील, आणि हे त्या दरवाजांतून, आकाशावर येत जात, तरी सुद्धा त्यांना आपल्या डोळ्यांवर विश्वास बसणार नाही; आणि पैगंबरांना मान्य करणार नाही. किंबहुना हे म्हणतील की, आमची नजरबंदी करून दिली गेली आहे. किंवा आमच्या वर जादू करून दिला गेला आहे. ज्यामुळे आम्हास असे वाटते की, आम्ही आकाशावर जात येत आहे. वास्तविक असे नाही आहे.
११) 'बूरूज' 'बूर्ज' चे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ प्रदर्शन करण्याचा आहे. यापासून 'तबर्रूज' आहे, जे स्त्रीयांच्या साजशृंगाराला प्रदर्शित करण्याच्या अर्थांत उपयोगात आणले जाते. येथे आकाशातील ताऱ्यांना 'बूरूज' म्हटले गेले आहे. कारण ते पण उंच आणि जाहीर होतात. काही म्हणतात की, बूरूज ने अभिप्रेत सूर्य आणि चंद्र आणि दुसऱ्या नक्षत्रांच्या त्या कक्षा आहेत, ज्या त्यांच्यासाठी निश्चित आहेत. आणि ही १२ नक्षत्रे (राशी) आहेत. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तुळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ, मीन. अरबांमध्ये या नक्षत्रांच्या मार्गक्रमणाच्या कक्षा, आणि त्यांच्या मार्फत, परिणाम घडविण्याच्या घटना आणि आपत्तीचे ज्ञान फार महत्त्वाचे समजले जात असे. जसे आज कालच्या अडाण्यामध्ये सुध्दा याची खास चर्चा आहे. आणि लोकांच्या भाग्याला, यांच्या मार्फत पाहिले आणि समजले जाते. वास्तविक यांचा काही संबंध जगात घडणाऱ्या घटना आणि आपत्तीशी नसतो. जे काही पण होते, ते अल्लाहच्या मर्जीनेच होते. अल्लाहतआलाने येथे या नक्षत्रांचा किंवा ताऱ्यांचा, उल्लेख आपले सामर्थ्य आणि आपल्या अनुपम कारागिरीचा नमुना म्हणुन केले आहे. याच्या शिवाय, हे स्पष्ट केले आहे की, ही आकाशाची शोभापण आहे.

| | |
|---|---|
| **आणि त्याला प्रत्येक धोंडमार केलेल्या शैतानापासून आम्ही सुरक्षित केले[१] ⑰** | وَحَفِظْنٰهَا مِنْ كُلِّ شَيْطٰنٍ رَّجِيْمٍ ﴿١٧﴾ |
| **हां! परंतु जो लपून छपून ऐकण्याचा प्रयत्न करीत, तर त्याच्यामागे लालभडक अंगारा लागतो[२] ⑱** | اِلَّا مَنِ اسْتَرَقَ السَّمْعَ فَاَتْبَعَهٗ شِهَابٌ مُّبِيْنٌ ﴿١٨﴾ |
| **आणि पृथ्वीला आम्ही विस्तृत केले; आणि तिच्यावर पर्वत आणून ठेवले. आणि आम्ही तिच्यांत, प्रत्येक वस्तू एका अंदाजाने उगविली आहे[३]. ⑲** | وَالْاَرْضَ مَدَدْنٰهَا وَاَلْقَيْنَا فِيْهَا رَوَاسِيَ وَاَنْۢبَتْنَا فِيْهَا مِنْ كُلِّ شَيْءٍ مَّوْزُوْنٍ ﴿١٩﴾ |
| **आणि इच्यातच आम्ही तुमच्या उपजिविका, बनविल्या आहेत[४]. आणि ज्यांना तुम्ही रोजी देणार नाहीत[५] ⑳** | وَجَعَلْنَا لَكُمْ فِيْهَا مَعَايِشَ وَمَنْ لَّسْتُمْ لَهٗ بِرٰزِقِيْنَ ﴿٢٠﴾ |
| **आणि जेवढ्यापण वस्तू आहेत, सर्वांचे खजीने आमच्याजवळ आहेत[६]; आणि आम्ही प्रत्येक वस्तुला तिच्या निश्चित केलेल्या अंदाजानुसार उतारतो. ㉑** | وَاِنْ مِّنْ شَيْءٍ اِلَّا عِنْدَنَا خَزَآئِنُهٗ وَمَا نُنَزِّلُهٗۤ اِلَّا بِقَدَرٍ مَّعْلُوْمٍ ﴿٢١﴾ |

१) 'रजीम' 'मरजूम' च्या अर्थांत आहे. रजमचा अर्थ धोंडमार करणे, म्हणजे दगड मारण्याचा आहे. शैतानाला रजीम याच्यासाठी म्हणण्यात आले आहे की, हा जेव्हा आकाशाकडे जाण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा आकाशातून लालभडक अंगारा (उल्कापात) त्याच्यावर तुटून पडतात. मग 'रजीम' निंदनीय आणि शापित, च्या अर्थांत पण उपयोगात आणला जातो; कारण की ज्याला धोंडमार करण्यात येते, त्याची सर्वांकडून शाप आणि निर्भत्सना करण्यात येते. येथे अल्लाहतआलाने हेच फर्माविले आहे की, आम्ही आकाशाचे संरक्षण केले, प्रत्येक धोंडमार केलेल्या शैतानापासून म्हणजे या ताऱ्यांच्यामार्फत कारण की, हे शैतानाला पिटाळून पळून जाण्याल भाग पाडतात.

२) याचा अर्थ हा आहे की, शैतान आकाशात गोष्टी ऐकण्यासाठी, जातात ज्याच्यावर उल्कापात तुटून पडतो. त्यामुळे काही तर जळून मरतात; आणि काही वांचून जातात; आणि काही ऐकून येतात. हदीसमध्ये याचे भाष्य अशाप्रकारे, येते, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम फर्मावितात, ''जेव्हा अल्लाहतआला आकाशांवर कुठला फैसला ऐकवितो, तर देवदूत त्याला ऐकूण, आपले पंख किंवा बाजू, फडफडवितात, (शालिनता आणि नम्रता म्हणून) जणू ती कोण्या खडकावर साखळ्यांची आवाज आहे. मग जेव्हा देवदूतांच्या मनांतून अल्लाहचे भय दूर होते, तेव्हा ते एक दुसऱ्याला विचारतात की, तुमच्या पालनकर्त्याने काय सांगितले? ते म्हणतात की, त्याने जे सांगितले, सत्य सांगितले; आणि तो महान आणि उच्च होय. (याच्यानंतर अल्लाहतआलाचा तो फैसला, वरून खालपर्यंत, एका कडून दुसऱ्याला ऐकविण्यांत येतो.) याप्रसंगी शैतान, चोरून लपून गोष्ट ऐकतात. आणि हे चोरून लपून गोष्ट ऐकणारे शैतान, थोड्या थोड्या अंतराने एक दुसऱ्याच्या वर असतात. आणि ते एखाद वाक्य ऐकून, आपला मित्र ज्योतिषी किंवा मांत्रिकाच्या कानात फुंकून देतात. आणि तो, त्याच्याबरोबर शंभर खोटे मिळवून, लोकांना वर्णन करून सांगतो (कृपया पहावे सहीह बुखारी तफसीर सू. हिज्र)

३) 'मौजून' अर्थात ठाऊक किंवा अपेक्षित, म्हणजे आवश्यकतेनुसार.

४) 'मआईश्' 'मईशतून' चे अनेकवचन आहे. म्हणजे जमिनीत, तुमच्या आवश्यकता आणि गुजरासाठी, अगणित साज व सामान निर्माण करून दिले.

५) याच्याने अभिप्रेत नोकर चाकर, गुलाम आणि जनावरे आहेत. म्हणजे जनावरांना तुमच्या ताब्यात करून दिले. ज्याच्यावर तुम्ही स्वारीपण करतात आणि सामान लादून घेऊन जाता; आणि त्यांना जबाह करून, खाऊन टाकातात. दास,दास्या आहेत. ज्यांच्याकडून तुम्ही सेवेची कामे घेतात. हे जरी सर्व तुमच्या आधिन आहेत, आणि तुम्ही त्यांच्या चारा आणि खाद्य वगैरेचा बंदोबस्त पण करता, परंतु वास्तविक त्यांना रोजी देणारा अल्लाहतआलाच आहे; तुम्ही नाहीत. तुम्ही असे समजू नये की, तुम्ही रोजी देणारे आहात; जर तुम्ही त्यांना खाऊ घालणार नाही, तर ते उपाशी मरतील.

६) काहींनी 'खजाईन' ने अभिप्रेत, पाऊस घेतला आहे; कारण की, पाऊसच उत्पन्नाचे साधन आहे. परंतु जास्त बरोबर गोष्ट ही आहे की, याच्याने अभिप्रेत ब्रम्हांडचे सर्व खजिने आहेत. ज्यांना अल्लाहतआला, आपल्या मर्जीप्रमाणे, आणि आपल्या इच्छा शक्तीने, अस्तित्वात आणित राहतो.

وَاَرۡسَلۡنَا الرِّيٰحَ لَوَاقِحَ فَاَنۡزَلۡنَا مِنَ السَّمَآءِ مَآءً فَاَسۡقَيۡنٰكُمُوۡهُ‌ۚ وَمَاۤ اَنۡتُمۡ لَهٗ بِخٰزِنِيۡنَ ﴿٢٢﴾

आणि आम्ही (पाण्याने) जड असा वारा[१] चालवून, मग आकाशातून पाणी वर्षवून, तुम्हास पाजतो; तुम्ही तर काही त्याची साठवणूक करून ठेवणारे नाहीत[२] ㉒

وَاِنَّا لَنَحۡنُ نُحۡیٖ وَنُمِيۡتُ وَنَحۡنُ الۡوٰرِثُوۡنَ ﴿٢٣﴾

आणि आम्हीच जिववितो आणि मारतो; आणि आम्हीच (सरशेवटी), वारसदार आहोत ㉓

وَلَقَدۡ عَلِمۡنَا الۡمُسۡتَقۡدِمِيۡنَ مِنۡكُمۡ وَلَقَدۡ عَلِمۡنَا الۡمُسۡتَاۡخِرِيۡنَ ﴿٢٤﴾

आणि तुमच्यातून जे पूर्वी होऊन गेले आहेत आणि जे तुमच्या मागून येणारे आहेत, त्यांना सुद्धा आम्ही जाणतो ㉔

ع ١٠ ٢ وَاِنَّ رَبَّكَ هُوَ يَحۡشُرُهُمۡ‌ؕ اِنَّهٗ حَكِيۡمٌ عَلِيۡمٌ ﴿٢٥﴾

२ ع १० २ आणि तुमचा पालनकर्ता, सर्व लोकांना (एकत्र) गोळा करील. खचित्च तो मोठा बुद्धीमान आणि वाकबगार आहे. ㉕

وَلَقَدۡ خَلَقۡنَا الۡاِنۡسَانَ مِنۡ صَلۡصَالٍ مِّنۡ حَمَاٍ مَّسۡنُوۡنٍ‌ۚ ﴿٢٦﴾

आणि खचित्च आम्ही माणसाला, खणखणत्या मातीपासून, जी कुजलेल्या गाऱ्यापासून होती, निर्माण केले आहे[३] ㉖

وَالۡجَآنَّ خَلَقۡنٰهُ مِنۡ قَبۡلُ مِنۡ نَّارِ السَّمُوۡمِ ﴿٢٧﴾

आणि याच्यापूर्वी आम्ही जिन्नातांना अग्नीच्या[४] ज्वालेपासून निर्माण केले ㉗

وَاِذۡ قَالَ رَبُّكَ لِلۡمَلٰٓـئِكَةِ اِنِّىۡ خَالِـقٌۢ بَشَرًا مِّنۡ صَلۡصَالٍ مِّنۡ حَمَاٍ مَّسۡنُوۡنٍ ﴿٢٨﴾

आणि जेव्हा तुझ्या पालनकर्त्याने देवदूतांना सांगितले की, मी एका मनुष्याला कुजलेला गारा जो वाळून खणखण बोलू लागतो, त्यापासून निर्माण करणार आहे. ㉘

فَاِذَا سَوَّيۡتُهٗ وَنَفَخۡتُ فِيۡهِ مِنۡ رُّوۡحِىۡ فَقَعُوۡا لَهٗ سٰجِدِيۡنَ ﴿٢٩﴾

तर मग, जेव्हा मी त्याला पूर्ण बनवून टाकेन, आणि त्यात आपला आत्मा फुंकेन तर तुम्ही सर्व त्याच्या समोर सजद्यात (साष्टांग नमस्कार) पडून[५] जा. ㉙

१) वाऱ्यांना जड करणारा, यासाठी म्हटले की, हा त्या ढगांना उचलतो, ज्यांत पाणी असते; ज्याप्रमाणे 'लिकहतुन' गर्भार उंटीणीला म्हटले जाते, जिच्या पोटात बच्चा असतो.

२) म्हणजे हे पाणी, जे आम्ही उतारतो, याला तुम्ही सांठवणूक करून ठेवण्याला पण समर्थ नाही. हे आमचेच सामर्थ्य आणि दया आहे की, आम्ही त्या पाण्यास झरे, विहीर, आणि नद्यामार्फत, संरक्षित ठेवतो. नाही तर, जर आम्ही इच्छिले, तर पाण्याची पातळी इतकी खाली करून देऊ की, झरे आणि विहीरीतून, पाणी घेणे, तुमच्याकरीता, शक्य राहणार नाही. ज्याप्रमाणे काही इलाख्यात अल्लाहतआला काही वेळा, आपल्या सामर्थ्याचा नमुना दाखविती. अल्लाहुम्मा, अहफजना मिनहु. (आमीन)

३) मातीच्या वेगवेगळ्या स्थितीच्या अनुषंगाने, तिची वेगवेगळी नावे आहेत- कोरडी माती, 'तुराब', भिजलेली 'तीन', तुडवलेली दुर्गंधयुक्त 'हमईम मसनुन' ही 'हमईन मसनून' कोरडी होऊन, खण खण वाजू लागली तर 'सल्साल' आणि जेव्हा तिला आगीत भाजले जाईल, तर 'फख्खार' (ठिकरी) म्हणवली जाते. येथे अल्लाहतआलाने, मनुष्याच्या निर्मितीची ज्याप्रकारे चर्चा केली आहे, याच्याने माहित होते की, आदम, मातीचा पुतळा, 'हम्ईन मसनून' (तुडवलेली, कुजलेली दुर्गंधयुक्त), माती पासून बनविला गेलेला, जेव्हा तो वाळून खणखण करू लागला, म्हणजे सलसाल होऊन गेला, तर त्याच्यात आत्मा फुंकला गेला. याच 'सलसाल' ला, कुरआनात दुसऱ्या ठिकाणी, 'कलफख्खार', (ठिकरी सारखी) म्हणण्यात आले आहे. ''निर्माण केले मनुष्याला खणखण करणाऱ्या मातीपासून जसे ठिकरे,'' (सू रहमान-१४)

४) 'जिन्न' ला जिन्न,यासाठी म्हणण्यात येते की, तो डोळ्यांनी दिसत नाही. सू.रहमान मध्ये जिन्नांची निर्मिती , 'मारिजीम् मिननार' ने दाखविण्यात आली आहे आणि स.मुस्लिमच्या एका हदीसमध्ये हेच सांगण्यात आले आहे. या अनुषंगाने, ज्वालावाली आग, किंवा आगीच्या ज्वाला, चा एकच अर्थ होईल.

५) सजद्याचा हा हुकूम सन्मान म्हणून होता; उपासना म्हणून नाही. आणि हा कारण की, अल्लाहचा हुकूम होता, म्हणून याच्या वाजीब होण्यात, काही शंका नाही. तथापि, ह.मोहम्मद ﷺ च्या धर्म शास्त्रात, सन्मान म्हणून सुद्धा, कोणा करीता सजदा करणे योग्य नाही.

فَسَجَدَ الْمَلٰٓئِكَةُ كُلُّهُمْ اَجْمَعُوْنَ ۙ﴿۳۰﴾

**म्हणून सर्व देवदूतांनी, सर्वच्या सर्वांनी सजदा करून घेतला ३०**

اِلَّاۤ اِبْلِيْسَ ؕ اَبٰۤى اَنْ يَّكُوْنَ مَعَ السّٰجِدِيْنَ ﴿۳۱﴾

**परंतु इबलीस, की, त्याने सजदा करणाऱ्यात सामील होण्यापासून नकार दिला. ३१**

قَالَ يٰۤاِبْلِيْسُ مَا لَكَ اَلَّا تَكُوْنَ مَعَ السّٰجِدِيْنَ ﴿۳۲﴾

**(अल्लाहतआलाने) फर्माविले, हे इबलिसा! तुला काय झाले, की तू सजदा करणाऱ्यांमध्ये शामील झाला नाहीस? ३२**

قَالَ لَمْ اَكُنْ لِّاَسْجُدَ لِبَشَرٍ خَلَقْتَهٗ مِنْ صَلْصَالٍ مِّنْ حَمَاٍ مَّسْنُوْنٍ ﴿۳۳﴾

**तो म्हणाला मी असा नाही की, या मनुष्याला सजदा करावा, ज्याला तू, काळ्या आणि कुजलेल्या खणखण वाजणाऱ्या, मातीपासून निर्माण केलेले आहेस[1] ३३**

قَالَ فَاخْرُجْ مِنْهَا فَاِنَّكَ رَجِيْمٌ ۙ﴿۳۴﴾

**फर्माविले, आता तू स्वर्गातून निघून जा. कारण की, तू अल्लाहच्या दरबारांतून बहिष्कृत केलेला आहेस ३४**

وَّاِنَّ عَلَيْكَ اللَّعْنَةَ اِلٰى يَوْمِ الدِّيْنِ ﴿۳۵﴾

**आणि तुझ्यावर माझा शाप कयामतच्या दिवसापर्यंत राहील ३५**

قَالَ رَبِّ فَاَنْظِرْنِيْۤ اِلٰى يَوْمِ يُبْعَثُوْنَ ﴿۳۶﴾

**(तो) म्हणू लागला हे माझ्या पालनकर्त्या! मला त्या दिवसापर्यंत ढील दे, की लोग दुसऱ्यांदा उठवून उभे केले जातील ३६**

قَالَ فَاِنَّكَ مِنَ الْمُنْظَرِيْنَ ۙ﴿۳۷﴾

**फर्माविले बरे, तर तू, त्यांच्यातून आहेस, ज्यांना अवकाश मिळालेला आहे. ३७**

اِلٰى يَوْمِ الْوَقْتِ الْمَعْلُوْمِ ﴿۳۸﴾

**निश्चित केलेल्या वेळेपर्यंतचा ३८**

قَالَ رَبِّ بِمَاۤ اَغْوَيْتَنِيْ لَاُزَيِّنَنَّ لَهُمْ فِي الْاَرْضِ وَلَاُغْوِيَنَّهُمْ اَجْمَعِيْنَ ۙ﴿۳۹﴾

**(शैतानाने) म्हटले की, हे माझ्या पालनकर्त्या! कारण की, तू मला मार्गभ्रष्ट केलेले आहेस, मला पण शपथ आहे की, मी सुद्धा जमीन, त्यांच्याकरीता, शोभायमान करून देईल आणि त्या सर्वांना बहकवून टाकीन ३९**

اِلَّا عِبَادَكَ مِنْهُمُ الْمُخْلَصِيْنَ ﴿۴۰﴾

**तुझ्या त्या सेवकांशिवाय, जे निवडून घेण्यात आले आहेत ४०**

قَالَ هٰذَا صِرَاطٌ عَلَيَّ مُسْتَقِيْمٌ ﴿۴۱﴾

**सांगितले की, होय! हाच माझ्यापर्यंत पोहचण्याचा सरळ मार्ग आहे[2] ४१**

اِنَّ عِبَادِيْ لَيْسَ لَكَ عَلَيْهِمْ سُلْطٰنٌ اِلَّا مَنِ اتَّبَعَكَ مِنَ الْغٰوِيْنَ ﴿۴۲﴾

**माझ्या सेवकांवर तुला काही प्राबल्य[3] नाही; परंतु होय! जे मार्गभ्रष्ट लोक, तुझे अनुकरण करतील ४२**

१) शैतानाने नाकारण्याचे कारण, ह.आदम عليه السلام चे मातीपासून होणे, आणि मनुष्य होणे, दाखविले. ज्याचा अर्थ हा झाला की, माणूस किंवा मनुष्याला, त्याच्या मनुष्यत्वाच्या आधारावर, क्षुल्लक आणि कमी लेखणे, हे शैतानाचे तत्त्वज्ञान आहे. जी सत्यवादींची श्रद्धा होऊ शकत नाही. म्हणूनच सत्यवादी पैगंबर عليه السلام च्या मनुष्यत्वाचे नाकारणारे नाहीत. यासाठी की, मनुष्याला स्वत: कुरआन करीमने खुलाशाने वर्णन केले आहे. याशिवाय, मनुष्यत्वाने, त्यांची महत्ता आणि शानमध्ये काहीही फरक पडत नाही.

२) म्हणजे तुम्हा सर्वांस, सरशेवटी, माझ्याकडे परतून येणे आहे. ज्याने माझे आणि माझ्या पैगंबरांचे आज्ञापालन केले असेल, मी त्यांना चांगला बदला देईन. आणि जो शैतानाच्या मागे लागून, भ्रष्टमार्गाचा अवलंब करीत राहिला असेल, त्याला कडक शिक्षा देईन, जी नरकाग्नीच्या स्वरूपात तयार आहे.

३) म्हणजे माझ्या पुण्यवान सेवकांवर तुझा डाव चालणार नाही. याचा हा अर्थ नाही की, त्याने काही पाप होणार नाही; किंबहुना अर्थ हा आहे की, त्यांच्या कडून असा गुनाह होणार नाही की, ज्याच्यानंतर ते पश्चात्ताप दग्ध आणि तौबा करणार नाहीत. कारण की, तोच अपराध माणसाला गारत करण्याला कारणीभूत आहे; की ज्याच्यानंतर माणसात पश्चात्तापाची जाणीव. आणि तौबा व अल्लाहकडे वळण्याची प्रवृत्ती निर्माण होणार नाही. अशा गुन्ह्यानंतर मनुष्य गुन्ह्यावर गुन्हे, करीत जातो. आणि सरशेवटी, कायमची बर्बादी आणि गारत होणे, त्याच्या नशीबी येते. आणि ईमानवाल्यांचे वैशिष्ट हे आहे की, गुन्हा करण्यावर अडून राहत नाही; किंबहुना लगेच तौबा करून, पुढच्या करता, यापासून वाचण्याचा प्रयत्न करतात.

وَإِنَّ جَهَنَّمَ لَمَوْعِدُهُمْ أَجْمَعِينَ ﴿٤٣﴾

आणि खचित्‌च या सर्वांच्या वायद्याचे स्थळ, नरकाग्नी[१] आहे. ४३

لَهَا سَبْعَةُ أَبْوَابٍ لِكُلِّ بَابٍ مِنْهُمْ جُزْءٌ مَقْسُومٌ ﴿٤٤﴾

ज्याला सात दरवाजे आहेत. प्रत्येक दरवाजांसाठी, त्यांचा एक भाग, वाटून देण्यात आला आहे[२] ४४

إِنَّ الْمُتَّقِينَ فِي جَنَّاتٍ وَعُيُونٍ ﴿٤٥﴾

नि:संशय अल्लाहला भिऊन चालणारे स्वर्गवासी लोक, बागात आणि झऱ्यांमध्ये असतील[३] ४५

ادْخُلُوهَا بِسَلَامٍ آمِنِينَ ﴿٤٦﴾

(त्यांना सांगण्यात येईल) शांती आणि समाधानाने, येथे येऊन जा[४] ४६

وَنَزَعْنَا مَا فِي صُدُورِهِمْ مِنْ غِلٍّ إِخْوَانًا عَلَىٰ سُرُرٍ مُتَقَابِلِينَ ﴿٤٧﴾

आणि यांच्या मनांत जो काही चुरस आणि मत्सर होता, आम्ही सर्वाला काढून टाकू.[५] ते भाऊ भाऊ बनून, एक दुसऱ्याच्या आमने सामने, बादशाही सिंहासनावर बसलेले असतील ४७

لَا يَمَسُّهُمْ فِيهَا نَصَبٌ وَمَا هُمْ مِنْهَا بِمُخْرَجِينَ ﴿٤٨﴾

आणि तेथे त्यांना कुठल्याही प्रकारचे कष्ट पोहचणार नाहीत, आणि तेथून कधीही ते काढले जाणार नाहीत ४८

نَبِّئْ عِبَادِي أَنِّي أَنَا الْغَفُورُ الرَّحِيمُ ﴿٤٩﴾

माझ्या सेवकांना कळवून द्या की, मी फारच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ४९

وَأَنَّ عَذَابِي هُوَ الْعَذَابُ الْأَلِيمُ ﴿٥٠﴾

आणि त्याच बरोबर माझ्या शिक्षा पण, ती शिक्षा जी फारच दु:खदायक आहे ५०

وَنَبِّئْهُمْ عَنْ ضَيْفِ إِبْرَاهِيمَ ﴿٥١﴾

त्यांना इब्राहीमच्या पाहुण्यांचा पण वृत्तांत ऐकवून द्या. ५१

إِذْ دَخَلُوا عَلَيْهِ فَقَالُوا سَلَامًا قَالَ إِنَّا مِنْكُمْ وَجِلُونَ ﴿٥٢﴾

की जेव्हा त्यांनी त्यांचे जवळ येऊन सलाम सांगितला, तेव्हा त्याने म्हटले, आम्हास तर तुमचे पासून भय वाटत आहे[६] ५२

१) म्हणजे जितके पण तुझे अनुयायी असतील, सर्व नरकाग्नीचे इंधन बनतील.

२) म्हणजे प्रत्येक दरवाजा, खास प्रकारच्या लोकांसाठी, खास राहील. उदाहरणार्थ एक दरवाजा मुशरिकांसाठी, एक नास्तिकांसाठी, एक दांभिकांसाठी, एक व्याभीचारी व्याज खाणारे, चोर आणि डाकूकरीता वगैरे वगैरे. किंवा या सात दरवाज्यांनी अभिप्रेत सात वर्ग आणि दर्जे आहेत. पहिला वर्ग किंवा दर्जा जहन्नम आहे; दुसरा लजा, मग हतमा, मग सओर मग सकर, मग जहीम, मग हाविय: सर्वांत वरचा दर्जा काही पाप केलेले, अल्लाहला एक मानणाऱ्यांचा असेल. ज्यांना काही काळ सजा दिल्यानंतर, किंवा शिफारशीवर काढून घेण्यात येईल. दुसऱ्यात यहूदी, तिसऱ्यात खिस्ती, चवथ्यात नक्षत्रपुजक, पांचव्यात अग्नीपुजक, सहाव्यात मुशरिक, आणि सातव्यात दांभिक लोक असतील. सर्वांत वरच्या दर्जाचे नाव जहन्नम आहे. याच्यानंतर याच क्रमाने नावे आहेत. (फत्हुल कदीर)

३) जहन्नम आणि जहन्नमवाले, यांच्यानंतर स्वर्ग आणि स्वर्गवाले, यांची चर्चा केली जात आहे. कारण स्वर्गात जाण्याला प्रोत्साहन मिळावे. मुत्तकीन ने अभिप्रेत, शिर्कपासून वांचणारे एकेश्वरवादी आहेत; आणि काहीजवळ, ते ईमानवाले, जे सर्व गुन्ह्यापासून वाचत राहिले. 'जन्नात' ने बाग़, आणि 'उयून' ने झरे अभिप्रेत आहे. हे बाग आणि झरे, एकतर सर्व, अल्लाहला भिणाऱ्यांसाठी, एकत्रित असतील, किंवा प्रत्येकासाठी वेगवेगळे बाग आणि झरे, किंवा एक एक , बाग व झरा असेल.

४) सलामती सर्व प्रकारच्या आपत्तीपासून आणि शांती सर्व प्रकारच्या भीतीपासून. किंवा हा अर्थ आहे की, एक मुसलमान दुसऱ्या मुसलमानाला किंवा देवदूत, स्वर्ग वाल्यांना ,सलामतीच्या दुआ देतील. किंवा अल्लाहकडून त्यांच्या सलामती आणि अभयाची घोषणा होईल.

५) जगात त्यांच्या दरम्यान जे आपसात मत्सर, द्वेष आणि शत्रुत्वाच्या भावना राहिल्या असतील, ते त्यांच्या अंत:करणातून काढून टाकण्यात येतील; आणि एक दुसऱ्याच्या बाबतीत त्यांची मने आरशासारखी स्वच्छ असतील.

६) ह.इब्राहीम عليه السلام ला या देवदुतापासून भीती यासाठी वाटली की, त्यांनी ह.इब्राहीमचे तयार केलेले भाजलेले वासरू खाल्ले नाही; जसा की, सू.हूद मध्ये तपशिल आला आहे. याच्याने ठाऊक झाले की, अल्लाहतआलाच्या प्रतिष्ठीत पैगंबरांना सुद्धा, अदृष्टाचे ज्ञान नव्हते; जर पैगंबर अदृष्टाचे ज्ञाते असते, तर ह.इब्राहीम عليه السلام समजून जाते की, आलेले पाहुणे देवदूत आहेत; आणि त्यांच्यासाठी जेवण करण्याची आवश्यकता नाही. कारण की, देवदूत माणसाप्रमाणे, खाण्यापिण्याचे मोहताज नाहीत.

| | |
|---|---|
| त्यांनी सांगितले, भिऊ नका; आम्ही तुला एका ज्ञानी पुत्राची शुभवार्ता देत आहोत (५३) | قَالُوْا لَا تَوْجَلْ اِنَّا نُبَشِّرُكَ بِغُلٰمٍ عَلِيْمٍ ۝٥٣ |
| (त्यांनी) म्हटले, काय या वृद्धत्वाने येऊन गांठल्या नंतर, तुम्ही मला शुभ वर्तमान देत आहात? हे शुभवर्तमान तुम्ही कसे देत आहात (५४) | قَالَ اَبَشَّرْتُمُوْنِيْ عَلٰٓى اَنْ مَّسَّنِيَ الْكِبَرُ فَبِمَ تُبَشِّرُوْنَ ۝٥٤ |
| ते म्हणाले, आम्ही तुम्हाला अगदी सत्य शुभवर्तमान ऐकवीत आहोत. आपण निराश लोकांत, शामील होऊन न जावेत[१] (५५) | قَالُوْا بَشَّرْنٰكَ بِالْحَقِّ فَلَا تَكُنْ مِّنَ الْقٰنِطِيْنَ ۝٥٥ |
| (त्यांनी) म्हटले आपला पालनकर्ताच्या रहमत कडून, निराश तर फक्त मार्गभ्रष्ट आणि बहकलेले लोकच होत असतात[२] (५६) | قَالَ وَمَنْ يَّقْنَطُ مِنْ رَّحْمَةِ رَبِّهٖٓ اِلَّا الضَّاۗلُّوْنَ ۝٥٦ |
| (त्यांनी) विचारले की, हे अल्लाहच्या पाठविलेल्या देवदूतांनो! तुमचे असे कोणते महत्त्वाचे काम आहे[३]? (५७) | قَالَ فَمَا خَطْبُكُمْ اَيُّهَا الْمُرْسَلُوْنَ ۝٥٧ |
| त्यांनी उत्तर दिले की, आम्ही गुन्हेगार लोकांकडे पाठविण्यात आलो आहोत; (५८) | قَالُوْٓا اِنَّآ اُرْسِلْنَآ اِلٰى قَوْمٍ مُّجْرِمِيْنَ ۝٥٨ |
| परंतु लूतचे कुटूंब, की आम्ही त्या सर्वांस अवश्य वाचवून घेऊ (५९) | اِلَّآ اٰلَ لُوْطٍ ۭ اِنَّا لَمُنَجُّوْهُمْ اَجْمَعِيْنَ ۝٥٩ |
| लूतच्या पत्नी शिवाय, की आम्ही तिला थांबणारे आणि मागे राहून जाणाऱ्यांमध्ये निश्चित केले आहे. (६०) | اِلَّا امْرَاَتَهٗ قَدَّرْنَآ ۙ اِنَّهَا لَمِنَ الْغٰبِرِيْنَ ۝٦٠ |
| जेव्हा पाठविलेले देवदूत, लूतच्या कुटुंबाजवळ पोहचले (६१) | فَلَمَّا جَاۗءَ اٰلَ لُوْطِۨ الْمُرْسَلُوْنَ ۝٦١ |
| तेव्हा लूतने म्हटले की, तुम्ही लोक तर काही अनोळखी से वाटतात[४] (६२) | قَالَ اِنَّكُمْ قَوْمٌ مُّنْكَرُوْنَ ۝٦٢ |
| त्यांनी सांगितले की, नाही; किंबहुना आम्ही तुझ्याकडे ती वस्तू आणली आहे, ज्याच्यांत हे लोक शंका कुशंका काढत होते[५] (६३) | قَالُوْا بَلْ جِئْنٰكَ بِمَا كَانُوْا فِيْهِ يَمْتَرُوْنَ ۝٦٣ |
| आणि आम्ही तर तुझ्याजवळ निखालस सत्य आणले आहे; आणि आहोत पण आम्ही अगदी खरे[६] (६४) | وَاَتَيْنٰكَ بِالْحَقِّ وَاِنَّا لَصٰدِقُوْنَ ۝٦٤ |
| आता तू आपल्या कुटुंबासमवेत, या रात्रीच्या कोण्या प्रहरात, निघून जा. तू स्वत: त्यांच्या मागे[७] रहावे; आणि (खबरदार)! तुमच्यातून कोणी सुद्धा, (मागे) वळून पाहू नये; आणि जेथला तुम्हास हुकूम दिला जात आहे, तेथे चालले जा. (६५) | فَاَسْرِ بِاَهْلِكَ بِقِطْعٍ مِّنَ الَّيْلِ وَاتَّبِعْ اَدْبَارَهُمْ وَلَا يَلْتَفِتْ مِنْكُمْ اَحَدٌ وَّامْضُوْا حَيْثُ تُؤْمَرُوْنَ ۝٦٥ |

१) कारण की, अल्लाहतआलाचा वायदा आहे, ज्याच्या विरूद्ध होऊ शकत नाही. या शिवाय तो प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. कुठलीही गोष्ट त्याच्यासाठी अशक्य नाही.

२) म्हणजे संतती होण्यावर, जे आश्चर्य व्यक्त करीत आहे, ते फक्त आपल्या वृद्धत्वामुळे करीत आहे. ही गोष्ट नाही की, मी आपल्या पालनकर्त्याच्या दयेकडून निराश आहे. पालनकर्त्याच्या दयेकडून निराशतर मार्गभ्रष्ट लोकच होतात.

३) ह.इब्राहीम عليه السلام नी, या देवदूतांच्या संभाषणामुळे, या गोष्टीचा अंदाज केला की हे फक्त संततीची शुभसूचना देण्यासाठीच आलेले नाहीत; किंबहुना त्यांच्या येण्याचा मूळ उद्देश्य, काही आणखीच आहे; म्हणून त्यांनी विचारले.

४) हे देवदूत सुंदर नवतरूणांच्या रूपात आले होते. आणि ह.लूत عليه السلام साठी बिल्कुल अपरिचित् होते. म्हणून त्यांनी त्यांच्याशी अनोळखीपणाच जाहीर केला.

५) म्हणजे अल्लाहची शिक्षा; जिच्यात तुझ्या लोकांना संशय आहे की, ती येऊ पण शकते?

६) या निखालस सत्याने पण शिक्षा अभिप्रेत आहे, जिच्यासाठी ते पाठविण्यात आले होते. म्हणून त्यांनी म्हटले की आम्ही आहोत पण बिल्कुल खरे. म्हणजे शिक्षेची जी गोष्ट आम्ही करीत आहोत, यात खरे आहोत. आता या लोकांच्या बरबादीचा समय, बिल्कुल समीप येऊन ठेपला आहे.

७) कारण की, कोणी ईमानवाल्याने मागे राहू नये; तू त्यांना पुढे काढित रहा.

| | |
|---|---|
| وَقَضَيْنَآ اِلَيْهِ ذٰلِكَ الْاَمْرَ اَنَّ دَابِرَ هٰٓؤُلَآءِ مَقْطُوْعٌ مُّصْبِحِيْنَ ﴿۶۶﴾ | **आणि आम्ही त्याच्याकडे या गोष्टीचा फैसला करून टाकला की सकाळ होताहोता या लोकांची पाळेमुळे समूळ नष्ट करून टाकली जातील[१] ६६** |
| وَجَآءَ اَهْلُ الْمَدِيْنَةِ يَسْتَبْشِرُوْنَ ﴿۶۷﴾ | **आणि शहरातील लोक आनंदीत होऊन आले[२] ६७** |
| قَالَ اِنَّ هٰٓؤُلَآءِ ضَيْفِيْ فَلَا تَفْضَحُوْنِ ﴿۶۸﴾ | **(लूतने) सांगितले हे लोक माझे पाहुणे आहेत; तुम्ही मला फजीत करू नका[३] ६८** |
| وَاتَّقُوا اللّٰهَ وَلَا تُخْزُوْنِ ﴿۶۹﴾ | **आणि अल्लाहतआलाला भ्या आणि मला फजीत करू नका ६९** |
| قَالُوْٓا اَوَلَمْ نَنْهَكَ عَنِ الْعٰلَمِيْنَ ﴿۷۰﴾ | **ते म्हणाले काय आम्ही तुला जगातल्या अनोळखी लोकांची तरफदारी करण्यापासून मना केले नव्हते?[४] ७०** |
| قَالَ هٰٓؤُلَآءِ بَنٰتِيْٓ اِنْ كُنْتُمْ فٰعِلِيْنَ ﴿۷۱﴾ | **(लूतने) म्हटले जर तुम्हास, करावयाचेच आहे, तर या माझ्या मुली उपस्थित आहेत[५] ७१** |
| لَعَمْرُكَ اِنَّهُمْ لَفِيْ سَكْرَتِهِمْ يَعْمَهُوْنَ ﴿۷۲﴾ | **तुझ्या वयाची शपथ! ते तर आपल्या बदमस्तीत झुलत होते[६] ७२** |
| فَاَخَذَتْهُمُ الصَّيْحَةُ مُشْرِقِيْنَ ﴿۷۳﴾ | **मग, सूर्य निघता निघता, त्यांना एका जोराच्या आवाजाने येऊन गाठले[७] ७३** |

१) म्हणजे लूत عليه السلام ला 'वह्य' च्या मार्फत, या निर्णयाला सूचित करून देण्यात आले की, सकाळ होईपर्यंत या लोकांची पाळेमुळे नष्ट करून टाकण्यात येतील. किंवा 'दाबिर' ने अभिप्रेत, तो शेवटचा माणूस आहे, जो बाकी राहून जाईल; सांगितले, तो पण सकाळ होईपर्यंत, गारद होऊन जाईल.

२) इकडे तर ह.लूत عليه السلام च्या घरात, लोकांच्या गारद करण्याचा फैसल्ला होता होत. तिकडे लूतच्या लोकांना कळले की लूत عليه السلام च्या घरात सुंदर दिसणारे नवतरूण, पाहुणे आलेले आहेत, तर आपल्या कोवळ्या मुलांशी संभोग करण्याच्या संवयीमुळे, फार आनंदित झाले, आणि आनंदाने ह.लूत عليه السلام जवळ आले, आणि मागणी केली की या नवतरूण मुलांना त्यांच्या हवाली करून दिले जावे; कारण की, त्यांनी त्यांच्याशी निर्लज्जपणाचे काम करून, आपले समाधान करू शकावे.

३) ह.लूत عليه السلام नी त्यांना समजाविण्याचा प्रयत्न केला, की हे पाहुणे आहे. त्यांना मी कशाप्रकारे तुमच्या हवाली करू शकतो? यात तर माझी फजिती आहे.

४) त्यांनी धीटपणा आणि वाईट चारित्र्याचे प्रदर्शन करीत सांगितले की, हे लूता! तू या अनोळखी लोकांचा कोण लागतो? आणि का त्यांची तरफदारी करतो? काय आम्ही तुला मना केले नाही की, तू अनोळखी लोकांची तरफदारी करीत जाऊ नकोस, किंवा त्यांना आपले पाहुणे बनवित जाऊ नकोस. हे सर्व संभाषण त्यावेळी झाले, जेव्हा की, ह.लूत عليه السلام ला याचे ज्ञान नव्हते की, हे अनोळखी पाहुणे, अल्लाहचे पाठविलेले देवदूत आहेत, आणि ते या मार्गभ्रष्ट लोकांना नष्ट करण्यासाठी, आलेले आहेत; जे या देवदूतांबरोबर कुकर्म करण्याचे इच्छुक होते. जसे की, सू.हूद मध्ये हा तपशील येऊन चुकला. येथे त्यांचा देवदूत असण्याचा उल्लेख, पहिले आला आहे.

५) म्हणजे तुम्ही त्यांच्याशी लग्न करून घ्या. किंवा आपल्या समाजाच्या स्त्रियांना आपल्या मुली म्हटले; म्हणजे तुम्ही स्त्रियांशी लग्न करा. किंवा ज्यांच्या विवाहबंधनात स्त्रिया आहेत, त्यांनी त्यांच्याशी वासनापूर्ती करावी.

६) अल्लाहतआला नबी ﷺ ला संबोधित करून, त्यांच्या जीवनाची शपथ खात आहे, ज्यामुळे आपली ﷺ सज्जनता आणि महत्ता स्पष्ट आहे. तथापि कोण्या दुसऱ्यासाठी, अल्लाहतआलाशिवाय, आणखी कोणाची शपथ घेणे, योग्य नाही. अल्लाहतआला तर, सर्व अधिकार संपन्न आहे, तो ज्याची इच्छील, शपथ घेईल; त्याला कोण विचारणार आहे? अल्लाहतआला फर्मावितो की, ज्यामुळे दारूच्या नशेत, धुंद मनुष्याची अक्कल मारली जाते, अशाचप्रकारे हे आपल्या कुमस्तीत आणि मार्गभ्रष्टतेत, इतके व्यस्त होते की, ह.लूत عليه السلام ची इतकी ठोस गोष्ट, त्यांच्या लक्षात आली नाही.

७) एका मोठ्या गर्जनेने, जेव्हा सूर्योदय होऊन चुकला होता, त्यांचा शेवट करून टाकला. काही म्हणतात की हा जोरदार आवाज, ह. जिब्रईल عليه السلام चा होता.

فَجَعَلْنَا عَالِيَهَا سَافِلَهَا وَأَمْطَرْنَا عَلَيْهِمْ حِجَارَةً مِّن سِجِّيلٍ ﴿۷۴﴾

सरशेवटी आम्ही शहराच्या वरच्या भागाला, त्याचा खालचा भाग करून टाकले;[१] आणि त्या लोकांवर, कंकरांच्या दगडांचा[२] वर्षाव केला. (७४)

إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَاتٍ لِّلْمُتَوَسِّمِينَ ﴿۷۵﴾

प्रत्येक बोध घेणाऱ्यांसाठी,[३] याच्यात बऱ्याचशा निशाण्या आहेत (७५)

وَإِنَّهَا لَبِسَبِيلٍ مُّقِيمٍ ﴿۷۶﴾

ही वस्ती अशा मार्गावर आहे, जेथे नेहमी रहदारी चालू असते[४] (७६)

إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَةً لِّلْمُؤْمِنِينَ ﴿۷۷﴾

खचितच् याच्यात ईमानदारांसाठी मोठी निशाणी आहे. (७७)

وَإِن كَانَ أَصْحَابُ الْأَيْكَةِ لَظَالِمِينَ ﴿۷۸﴾

आणि 'ऐका' वस्तीचे राहणारे पण फार जुलुमी[५] होते (७८)

فَانتَقَمْنَا مِنْهُمْ وَإِنَّهُمَا لَبِإِمَامٍ مُّبِينٍ ﴿۷۹﴾

ज्यांच्यावर आम्ही (शेवटी) सूड उगवूनच घेतला. ही दोन्ही शहरे सार्वजनिक रस्त्यावर आहेत[६] (७९)

وَلَقَدْ كَذَّبَ أَصْحَابُ الْحِجْرِ الْمُرْسَلِينَ ﴿۸۰﴾

आणि 'हिज्र' वाल्यांनी सुद्धा पैगंबरांना खोटे[७] ठरविले (८०)

وَآتَيْنَاهُمْ آيَاتِنَا فَكَانُوا عَنْهَا مُعْرِضِينَ ﴿۸۱﴾

आणि ज्यांना आम्ही आमच्या निशाण्यापण दिल्या होत्या; परंतु तरी सुद्धा, ते त्यांच्यापासून तोंड फिरवतच[८] राहिले. (८१)

وَكَانُوا يَنْحِتُونَ مِنَ الْجِبَالِ بُيُوتًا آمِنِينَ ﴿۸۲﴾

आणि हे लोक आपली घरे, अभय होऊन पर्वतात कोरून घेत असत[९] (८२)

فَأَخَذَتْهُمُ الصَّيْحَةُ مُصْبِحِينَ ﴿۸۳﴾

अखेर त्यांना सुद्धा सकाळ होताहोता, मोठ्या गर्जनेने येऊन[१०] गांठले (८३)

فَمَا أَغْنَىٰ عَنْهُم مَّا كَانُوا يَكْسِبُونَ ﴿۸۴﴾

मग कुठल्याही युक्तीने आणि कर्माने, त्यांचा काही फायदा झाला नाही (८४)

وَمَا خَلَقْنَا السَّمَاوَاتِ وَالْأَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا إِلَّا بِالْحَقِّ ۗ وَإِنَّ السَّاعَةَ لَآتِيَةٌ ۖ فَاصْفَحِ الصَّفْحَ الْجَمِيلَ ﴿۸۵﴾

आणि आम्ही आकाशांना आणि पृथ्वीला, आणि त्यांच्या दरम्यानच्या सर्व वस्तूंना, सत्य संकल्पानेच निर्माण केले आहे;[११] आणि कयामत अवश्य येईलच येईल. तर तू संभावितपणे (आणि चांगुलपणे) उपेक्षा कर (८५)

إِنَّ رَبَّكَ هُوَ الْخَلَّاقُ الْعَلِيمُ ﴿۸۶﴾

खचितच् तुझा पालनकर्ताच निर्माण करणारा आणि जाणकार आहे. (८६)

وَلَقَدْ آتَيْنَاكَ سَبْعًا مِّنَ الْمَثَانِي وَالْقُرْآنَ الْعَظِيمَ ﴿۸۷﴾

आणि खचितच् आम्ही आपणास, सात महावाक्ये देऊन ठेवली आहेत;[१२] जी वारंवार वाचली जातात. आणि महिमाशाली कुरआन पण देऊन ठेवले आहे (८७)

لَا تَمُدَّنَّ عَيْنَيْكَ إِلَىٰ مَا مَتَّعْنَا بِهِ أَزْوَاجًا مِّنْهُمْ وَلَا تَحْزَنْ عَلَيْهِمْ وَاخْفِضْ جَنَاحَكَ لِلْمُؤْمِنِينَ ﴿۸۸﴾

आपण आपली नजर त्या वस्तूवर मुळीच दवडू नका, ज्या आम्ही, यांच्यातून कित्येक लोकांना देऊन ठेवल्या आहेत; तसेच आपण त्यांच्यावर खेद पण करू नये; आणि ईमानवाल्यांशी नम्रतेने वागत[१३] जा (८८)

१) सांगण्यात येते की, यांच्या वस्तीला, जमिनीवरून, उचलून, आकाशांत घेऊन जाण्यात आले, आणि तेथून त्यांना उलटे करून, जमिनीवर फेंकून देण्यात आले. अशाप्रकारे वरचा भाग खाली आणि खालचा भाग वर करून, उलट पालट करून टाकण्यात आले आणि सांगण्यात येते की, याच्याने अभिप्रेत वस्ती छतासह जमिनदोस्त होणे आहे.

२) याच्यानंतर त्यांच्यावर खंगर प्रकारचे विशिष्ट दगड, वर्षाविले गेले. अशाप्रकारे जणू तीन प्रकारच्या शिक्षा त्यांना देऊन बोध घेण्यासाठी निशान बनवून दिले.

३) चांगल्या दृष्टीने पाहणाऱ्यास, आणि चिंतन आणि मनन करणाऱ्यास, 'मुतवस्सिमीन' म्हटले जाते. 'मुतवस्सिमीन' करिता या घटनेत, बोध घेण्याच्या गोष्टी, आणि निशाण्या आहेत.

४) अभिप्रेत सार्वजनिक मोठा रस्ता आहे. म्हणजे लूतच्या लोकांच्या वस्त्या, मदिनेहून सीरियाला जाताना, रस्त्यात पडतात. प्रत्येक येणाऱ्या जाणाऱ्याला, याच वस्त्यांतून पार होऊन जावे लागते. असे म्हणतात की, या पांच वस्त्या

होत्या. 'सदूम' (ही मध्यवर्ती वस्ती होती.) 'सअबतुन', 'सअव:', 'असरा' आणि 'दूमा'.

५) 'ऐका' घनदाट वृक्षाला म्हणतात. या वस्तीत घनदाट वृक्ष असतील; म्हणून त्यांना 'वनावाले' म्हणण्यात आले आहे. याच्याने अभिप्रेत ह. शोएब ﷺ चे लोक आहेत. त्यांचा काळ ह.लूत ﷺ च्या नंतर आहे; आणि त्यांचा इलाखा हिजाज आणि सीरियाच्या दर्म्यान, ह. लूत ﷺ च्या लोकांच्या जवळच होता. त्याला 'मदयन' म्हटले जाते. जे ह.इब्राहीम ﷺ च्या पुत्राचे किंवा नातवाचे नाव होते. आणि याच्याच नावावर वस्तींचे नाव पडले होते. यांचा जुलूम हा होता की, अल्लाहबरोबर शिर्क करीत असत. रस्ता लुटणे हा त्यांचा छंद होता. आणि कमी तोलणे आणि मापणे, ही त्यांची खोड होती. यांच्यावर जेव्हा शिक्षा आली, तेव्हा तर ढगाने त्यांच्यावर सावली केली, मग गर्जना आणि धरणीकंपाने मिळून त्यांना गारत करून टाकले.

६) 'इमामे मुबीन' चा अर्थपण सार्वजनिक मोठा रस्ता आहे; ज्यावरून रात्रंदिवस लोक जात असतात. दोन्ही शहरांनी अभिप्रेत, लूत ﷺ च्या लोकांचे शहर आणि शोएब ﷺ च्या लोकांचे ठिकाण, 'मदयन' अभिप्रेत आहे. हे दोन्ही, एक दुसऱ्याच्या जवळच होते.

७) 'हिज्र' हे सॉलेह ﷺ ची कौम, 'समूद' च्या वस्तीचे नाव होते. त्यांना हिज्रवाले म्हणण्यात आले आहे. ही वस्ती मदीना आणि तबूकच्या दर्म्यान होती. त्यांनी आपले पैगंबर ह. सॉलेह ﷺ ला खोटे ठरविले. परंतु येथे अल्लाहतआलाने फर्माविले, ''त्यांनी पैगंबरांना खोटे ठरविले.'' हे यासाठी की, एका पैगंबराला खोटे ठरविणे, असेच आहे, जणू साऱ्या पैगंबरांना खोटे ठरविणे.''

८) या निशाण्यात ती उंटिण पण होती, जी त्यांच्या सांगण्यानुसार, एका मोठ्या शिळेतून, चमत्कार म्हणून जाहीर केली गेली होती. परंतु जुलुम्यांनी तिला पण ठार करून टाकले.

९) म्हणजे कुठल्याही भय आणि आवश्यकतेशिवाय, पर्वत कोरून घेत असत. ९ हिजरीत तबूकला जातांना, जेव्हा रसूलुल्लाह ﷺ, जेव्हा या वस्तीतून गेले, तेव्हा आपण डोक्यावर कापड गुंडाळून घेतले. आणि आपल्या स्वारीला तेज़ करून घेतले; आणि सहाबांना ﷺ सांगितले की, रडत रडत, आणि अल्लाहच्या शिक्षेला भित भित, या वस्तीतून पार पडा. (इब्ने कसीर) स.बुखारी आणि मुस्लिममध्ये, सुद्धा ही रिवायत आहे.

१०) ह.सॉलेह ﷺ नी त्यांना सांगितले की, तीन दिवसानंतर तुमच्यावर शिक्षा येईल. आणि झालेही तसेच. चवथ्या दिवशी त्यांच्यावर शिक्षा आली.

११) सत्त्याने अभिप्रेत ते फायदे आणि प्रयुक्त्या आहेत, ज्या आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीचा उद्देश्य आहे. किंवा हकने अभिप्रेत पुण्यकर्म करणाऱ्यांना, त्यांच्या पुण्याचा, आणि कुकृत्य करणाऱ्यांना त्यांच्या वाईट कृत्याचा बदला देणे आहे, ज्याप्रमाणे एका दुसऱ्या जागी फर्माविले, ''अल्लाहसाठीच आहे जे आकाशांत आहे आणि पृथ्वींत आहे; कारण की, त्याने वाईट कृत्य करणाऱ्यांना, त्यांच्या वाईटाचा, आणि पुण्यवानांना त्यांच्या पुण्याचा बदला द्यावा.'' (सू नजम् - ३१)

१२) 'सबआ मसानी' ने अभिप्रेत काय आहे? याच्यात भाष्यकारांमध्ये मतभेद आहेत. खरी गोष्ट ही आहे की, याच्याने अभिप्रेत, सू.फातेहा आहे. ही सात महावाक्ये आहेत; जी प्रत्येक नमाजीत, वारंवार म्हटली जातात. (मसानी चा अर्थ वारंवार म्हणण्याचा केला गेला आहे.) हदीसने पण याचे समर्थन होते. म्हणून एका हदीसमध्ये रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, ''अल्हम्दु लिल्लाहि रब्बील आलमीन'' हे सबआ मसानी आणि कुरआन अजीम आहे. जी मला देण्यात आली आहेत. (स.बुखारी तफसीर सू.हिज्र) एका आणखी हदीसमध्ये फर्माविले, ''सू.फातेहा कुरआनाचा एक भाग आहे. म्हणून कुरआन अजीमचा पण उल्लेख बरोबरच केला गेला आहे.

१३) म्हणजे आम्ही, सू.फातेहा आणि कुरआन अजीम सारख्या देणग्या, आपणांस प्रदान केल्या आहेत; म्हणून ही दुनिया आणि तिच्या शोभायमान वस्तू, आणि त्या वेगवेगळ्या प्रकारच्या दुनियावाल्यांकडे, नजर दौडवू नका. ज्यांना या नश्वर जगताच्या, तात्कालिक गोष्टी आम्ही दिल्या आहेत. आणि ते जे आपल्याला खोटे ठरवितात, त्यावर दु:खी होऊ नका; आणि ईमानवाल्यांसाठी आपल्या बाजू झुकवून घ्या. म्हणजे त्यांच्यासाठी नम्रता आणि प्रेमाची वागणूक आत्मसात करा. या विचारसरणीचे मूळ हे आहे की, जेव्हा पक्षी आपल्या पिल्लांना, वात्सल्याच्या छायेत घेतो; तेव्हा त्यांना आपल्या बाजू म्हणजे पंखाखाली घेतो. अशा रीतीने ही पद्धत नम्रता आणि प्रेमाची वागणूक अंगिकारण्याच्या संदर्भात, उपयोगात आणली जाते.

وَقُلۡ إِنِّيٓ أَنَا ٱلنَّذِيرُ ٱلۡمُبِينُ ٨٩
**आणि (आपण) सांगून टाका की, मी तर स्पष्टपणे भिवविणारा आहे ८९**

كَمَآ أَنزَلۡنَا عَلَى ٱلۡمُقۡتَسِمِينَ ٩٠
**जसे की, आम्ही या तुकडे तुकडे करणाऱ्यावर अवतरीत[१] केले; ९०**

ٱلَّذِينَ جَعَلُواْ ٱلۡقُرۡءَانَ عِضِينَ ٩١
**ज्यांनी अल्लाहच्या या पुस्तकाचे तुकडे तुकडे करून टाकले ९१**

فَوَرَبِّكَ لَنَسۡـَٔلَنَّهُمۡ أَجۡمَعِينَ ٩٢
**शपथ आहे तुझ्या पालनकर्त्याची, की, आम्ही या सर्वांची जरूर विचारपूस करू ९२**

عَمَّا كَانُواْ يَعۡمَلُونَ ٩٣
**प्रत्येक त्या गोष्टीची, जे हे करतात ९३**

فَٱصۡدَعۡ بِمَا تُؤۡمَرُ وَأَعۡرِضۡ عَنِ ٱلۡمُشۡرِكِينَ ٩٤
**बस आपण[२] या हुकूमाला, जो आपणास दिला जात आहे, स्पष्ट करून सांगून द्या; आणि मुशरिकांकडून तोंड फिरवून घ्या. ९४**

إِنَّا كَفَيۡنَٰكَ ٱلۡمُسۡتَهۡزِءِينَ ٩٥
**आपल्याशी जे लोक टवाळकी करतात त्यांना शिक्षा देण्यात आम्ही पुरेसे आहोत ९५**

ٱلَّذِينَ يَجۡعَلُونَ مَعَ ٱللَّهِ إِلَٰهًا ءَاخَرَۚ فَسَوۡفَ يَعۡلَمُونَ ٩٦
**जे की, अल्लाहच्या बरोबर, दुसरे उपास्य ठरवितात; त्यांना लवकरच ठाऊक होऊन जाईल ९६**

وَلَقَدۡ نَعۡلَمُ أَنَّكَ يَضِيقُ صَدۡرُكَ بِمَا يَقُولُونَ ٩٧
**आणि आम्हास, फार चांगल्या प्रकारे ठाऊक आहे की, याच्या गोष्टीने आपले अंत:करण संकुचित होते. ९७**

فَسَبِّحۡ بِحَمۡدِ رَبِّكَ وَكُن مِّنَ ٱلسَّٰجِدِينَ ٩٨
**आपण आपल्या पालनकर्त्याची स्तुती आणि पावित्र्य वर्णन करा; आणि त्याच्यापुढे सजदा करणाऱ्यांपैकी होऊन जावे ९८**

وَٱعۡبُدۡ رَبَّكَ حَتَّىٰ يَأۡتِيَكَ ٱلۡيَقِينُ ٩٩
**आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना करीत रहावे, येथपावेतो की, आपणांस निश्चयात्मक हुकूम (मृत्यू) येऊन ठेपेल[३] ९९**

१) काही भाष्यकारांजवळ 'अन्‌जलना' चा 'मफऊल' 'अल्‌अजाब' महजुफ आहे. म्हणजे हे आहे की, मी तुम्हास शिक्षेपासून (अगदी) स्पष्टपणे भिवविणारा आहे. त्या शिक्षेसारखी जी 'मुक्तसिमीन', वर अवतरीत झाली. 'मुक्तसिमीन' कोण आहेत? ज्यांनी अल्लाहच्या पुस्तकाचे तुकडे तुकडे करून टाकले. काही म्हणतात की, याच्याने कुरैशचे लोक अभिप्रेत आहेत, ज्यांनी अल्लाहच्या पुस्तकाची वाटणी करून टाकली. याच्या काही भागाला काव्य, काहिला जादू, काहिला मंत्रतंत्र, काहींना पूर्वीच्या लोकांच्य गोष्टी, ठरवून टाकले. काही म्हणतात की, मुक्तसिमीनने ग्रंथधारी लोक, आणि कुरआनाने अभिप्रेत, तौरात आणि इंजील आहेत. त्यांनी या आकाशी ग्रंथांना वेगवेळ्या भागांत, वाटून टाकले होते. काही म्हणतात की, हे ह.सॉलेह عليه السلام चे लोक आहेत; ज्यांनी आपसात शपथ घेतली होती की, ह.सॉलेह عليه السلام आणि त्यांच्या कुटुंबियांना रात्रीच्या अंध:कारात ठार मारून टाकतील. ''त्यांनी आपसात शपथा घेऊन करार केला की, रात्रीच सॉलेह आणि त्याच्या घरवाल्यांना कत्ल करुन टाकू'' (सू. नमल-४९) आणि आकाशी ग्रंथाला तुकडे तुकडे करून टाकले. 'इजीन' चा एक अर्थ हा पण केला गेला आहे. की याच्या काही गोष्टीवर ईमान आणणे, आणि काहींना नाकारणे.

२) 'असद्‌अ्' चा अर्थ आहे, अगदी स्पष्टपणे वर्णन करणे. या महावाक्याच्या अवतरणापूर्वी, आपण ﷺ लपून छपून धर्मप्रचार करीत असत. याच्यानंतर आपण ﷺ नी खुल्लम खुल्ला, प्रचार सुरू करून दिला. (फत्हुल कदीर)

३) मुशरिकीन आपणास ﷺ जादुगीर, वेडा, मांत्रिक, वगैरे म्हणत. ज्यामुळे मानवी स्वभावानुसार, आपण दु:खी होत असत; अल्लाहतआलाने सांत्वना करीत फर्माविले, की आपण अल्लाहची स्तुती व प्रशंसा करावी; नमाज पढावी; आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना करावी; याच्याने आपणास मन:शांती पण मिळेल, आणि अल्लाहची मदतपण मिळेल. सजद्याने येथे नमाज आणि यकीन ने, मृत्यू अभिप्रेत आहे.

آیاتها ١٢٨ (١٦) سُوْرَةُ النَّحْلِ مَكِّيَّةٌ (٧٠) رکوعاتها ١٦

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

# (१६) सू.नहल

महावाक्ये १२८ — रुकूअ १६

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

أَتَىٰٓ أَمْرُ اللّٰهِ فَلَا تَسْتَعْجِلُوْهُ ۚ سُبْحٰنَهٗ وَتَعٰلٰى عَمَّا يُشْرِكُوْنَ ①

**अल्लाहतआलाचा हुकूम येऊन पोहचला; आता याच्यासाठी घाई करू नका.[१] सर्व पावित्र्य त्याच्या (च) साठी आहे. तो या सर्वांहून थोर आहे, ज्यांना हे अल्लाहचे भागीदार ठरवितात. १**

يُنَزِّلُ الْمَلٰٓئِكَةَ بِالرُّوْحِ مِنْ أَمْرِهٖ عَلٰى مَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖٓ أَنْ أَنْذِرُوْٓا أَنَّهٗ لَآ إِلٰهَ إِلَّآ أَنَا فَاتَّقُوْنِ ②

**तोच देवदूतांना आपले 'वह्य'[२] देऊन, आपल्या हुकूमाने, आपल्या सेवकांतून, ज्यावर इच्छितो,[३] उतारतो की तुम्ही लोकांस सावध करून द्या की, माझ्या शिवाय कोणी उपास्य नाही. मग तुम्ही मला भ्या २**

خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْأَرْضَ بِالْحَقِّ ۚ تَعٰلٰى عَمَّا يُشْرِكُوْنَ ③

**त्यानेच आकाश आणि पृथ्वीला सत्य संकल्पाने निर्माण केले.[४] तो यापासून ऊंच (अलिप्त) आहे, जे शिर्क हे करतात ३**

خَلَقَ الْإِنْسَانَ مِنْ نُّطْفَةٍ فَإِذَا هُوَ خَصِيْمٌ مُّبِيْنٌ ④

**त्याने मनुष्याला विर्याच्या थेंबापासून निर्माण केले, असे असतांना सुद्धा तो धडधडीत वाद घालू लागला[५] ४**

وَالْأَنْعَامَ خَلَقَهَا ۚ لَكُمْ فِيْهَا دِفْءٌ وَّمَنَافِعُ وَمِنْهَا تَأْكُلُوْنَ ⑤

**आणि त्यानेच चतुष्पाद प्राणी निर्माण केले, ज्यात तुमच्या करीता, थंडी वाऱ्यांपासून वाचण्याचे पोषाख आहेत. आणखीही पुष्कळशे[६] फायदे आहेत; आणि काही तुमच्या खाण्याच्या कामी येतात ५**

وَلَكُمْ فِيْهَا جَمَالٌ حِيْنَ تُرِيْحُوْنَ وَحِيْنَ تَسْرَحُوْنَ ⑥

**आणि यात तुमच्यासाठी भूषणपण आहे. जेव्हा चारून आणता तेव्हा सुद्धा, आणि जेव्हा चरावयास नेता तेव्हा सुद्धा[७] ६**

१) याच्याने अभिप्रेत कयामत आहे; म्हणजे ती कयामत जवळ येऊन लागली आहे, जिला तुम्ही दूर समजत होता. मग घाई करू नका. किंवा ती शिक्षा अभिप्रेत आहे, जिची मुशरिकीन मागणी करीत होते. तिला भविष्य कालिनच्या ऐवजी, भूतकाळाच्या सेग्यांने वर्णन केले. कारण की तिचे घडणे निश्चित आहे.

२) 'रुह' ने अभिप्रेत 'वह्य' आहे. जसे की, कुरआन मजीदच्या दुसऱ्या ठिकाणी आहे, ''अशाचप्रकारे आम्ही आपल्याकडे, आपल्या हुकूमाने वह्य केले; याच्यापूर्वी आपणास ज्ञान नव्हते की, पुस्तक काय आहे? आणि ईमान काय आहे?''...... (सू. शुरा - ५२)

३) अभिप्रेत पैगंबर (लोक) عليهم السلام आहेत, ज्यांच्यावर 'वह्य' अवतरीत होत असते. ज्याप्रमाणे अल्लाहने फर्माविले, ''अल्लाह खूप चांगल्या प्रकारे जाणतो की, त्याने आपली पैगंबरी कोणाकडे ठेवावी'' (सू. अन्आम - १२४) ''तो आपल्या हुकूमाने, आपल्या सेवकांतून ज्याच्यावर इच्छितो, त्याच्यावर वह्य टाकतो म्हणजे अवतरीत करतो; कारण की, त्याने भेटीवाल्या (कयामतच्या) दिवसाने, लोकांना भिववाने.'' (सू. मोमिन-१५)

४) म्हणजे निव्वळ तमाशे आणि खेळकुद म्हणून निर्माण केले नाही; किंबहुना एक उद्देश्य डोळ्यासमोर आहे. आणि तो आहे, पुण्यफळ आणि शिक्षा; जसा की आताच, तपशील येऊन चुकला.

५) म्हणजे एका थेंबापासून, जी एका जीवधारी पासून निघते, ज्याला वीर्य म्हणतात; त्याला निरनिराळ्या अवस्थेतून पार करून, एक पूर्ण स्वरूप दिले जाते; मग अल्लाहतआला त्याच्यात आत्मा फुंकतो, आणि आईच्या पोटातून काढून, या जगात आणतो. ज्यात तो जीवन घालवितो. परंतु जेव्हा त्याला समजबुझ येऊन जाते तेव्हा, याच पालनकर्त्याच्या बाबतीत वादविवाद करतो; त्याला नाकारतो, किंवा त्याच्या बरोबर सरकतदार ठरवितो.

६) याच उपकाराबरोबर, दुसऱ्या उपकाराचा उल्लेख केला की, चतुष्पाद (उंट,गाई आणि बकऱ्या) पण त्यानेच निर्माण केलेत, ज्यांच्या केस आणि लोकरीपासून, तुम्ही गरम कपडे तयार करून, उष्णता प्राप्त करतात. अशाचप्रकारे त्यांच्याकडून दुसरे फायदेपण प्राप्त करतात; उदाहरणार्थ त्यांच्यापासून दूध मिळवितात, त्यांच्यावर स्वार होतात, आणि सामान लादतात, त्यांच्याकडून नांगर चालवितात, आणि शेतांना पाणी पाजतात, वगैरे वगैरे.

७) 'तुरीहून' जेव्हा संध्याकाळी, कुरणांतून चारून, घरी आणतात, 'तसरहून' जेव्हा सकाळी चरण्याकरीता, घेऊन जातात; या दोन्ही वेळी हे लोकांच्या दृष्टीस पडतात; ज्यामुळे तुमच्या रूपसौंदर्यांत भरत पडते. या दोन्ही वेळांशिवाय ते नजरेआड, किंवा वाड्यांमध्ये बंदिस्त असतात.

وَ تَحۡمِلُ اَثۡقَالَكُمۡ اِلٰى بَلَدٍ لَّمۡ تَكُوۡنُوۡا بٰلِغِيۡهِ اِلَّا بِشِقِّ الۡاَنۡفُسِ ؕ اِنَّ رَبَّكُمۡ لَرَءُوۡفٌ رَّحِيۡمٌ ۙ‏ ﴿۷﴾

आणि तुमची ओझी त्या शहरापर्यंत वाहून घेऊन जातात, जेथे तुम्ही स्वत:ला झिजविल्याशिवाय, पोहचूच शकत नव्हते. खचित्च तुमचा पालनकर्ता फारच करूणाशिल आणि दयाळू आहे ⑦

وَّالۡخَيۡلَ وَالۡبِغَالَ وَالۡحَمِيۡرَ لِتَرۡكَبُوۡهَا وَ زِيۡنَةً ‌ؕ وَيَخۡلُقُ مَا لَا تَعۡلَمُوۡنَ‏ ﴿۸﴾

आणि घोड्यांना, खेचरांना, गाढवांना त्यानेच निर्माण केले की, तुम्ही त्यावर स्वार व्हावे; आणि ते (तुमच्यासाठी) भूषणास्पद पण आहेत.[१] आणखी पण तो अशा पुष्कळशा, वस्तू निर्माण करतो, ज्याचे तुम्हास ज्ञान पण नाही.[२] ⑧

وَعَلَى اللّٰهِ قَصۡدُ السَّبِيۡلِ وَمِنۡهَا جَآٮِٕرٌ‌ ؕ وَلَوۡ شَآءَ لَهَدٰٮكُمۡ اَجۡمَعِيۡنَ ‏﴿۹﴾

आणि अल्लाहतआलाकडे सरळमार्ग [३] दाखून देणे आहे; आणि काही वाकडे मार्ग आहेत; आणि जर तो इच्छिता, तर तुम्हा सर्वांस, सरळ मार्गाला लावून दिले असते.[४] ⑨

هُوَ الَّذِىۡۤ اَنۡزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً‌ لَّـكُمۡ مِّنۡهُ شَرَابٌ وَّمِنۡهُ شَجَرٌ فِيۡهِ تُسِيۡمُوۡنَ‏ ﴿۱۰﴾

तोंच तुमच्या फायद्यासाठी, आकाशांतून पाणी वर्षावितो, ज्याला तुम्ही पितात सुद्धा, आणि त्याच्यानेच उगलेल्या वृक्षांना, तुम्ही आपल्या जनावरांना चारतात ⑩

يُنۡۢبِتُ لَـكُمۡ بِهِ الزَّرۡعَ وَالزَّيۡتُوۡنَ وَالنَّخِيۡلَ وَالۡاَعۡنَابَ وَمِنۡ كُلِّ الثَّمَرٰتِ‌ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيَةً لِّقَوۡمٍ يَّتَفَكَّرُوۡنَ‏ ﴿۱۱﴾

याच्यापासून तो तुमच्यासाठी, शेती आणि जैतून, आणि खजुर आणि द्राक्षे आणि प्रत्येक प्रकारची फळे उगवितो; विचार करणाऱ्या लोकांसाठी तर याच्यांत मोठीच निशाणी[५] आहे. ⑪

१) म्हणजे त्यांच्या निर्मितीचा मूळ उद्देश्य, आणि फायदा तर त्यांच्यावर स्वार होणे आहे. तथापि हे भूषणावह सुद्धा आहे. घोडे,खेचरे, आणि गाढवे, यांचा वेगळा उल्लेख केल्याने अहनाफ, आणि काही धर्मशास्त्रीयांनी, अशा प्रकारे आधार घेतला आहे की, घोडापण अशा प्रकारे हराम आहे, ज्याप्रमाणे गाढव आणि खेचर. याशिवाय खाण्यात येणाऱ्या चतुष्पादांचा पूर्वीच उल्लेख येऊन चुकला आहे. म्हणून या महावाक्यांचा ज्या तीन जनावरांचा उल्लेख आहे, हे फक्त स्वार होण्यासाठी आहेत. परंतु हा आधार बरोबर नाही, कारण की, सहीह हदीशींनी, घोड्याचे हलाल होणे सिद्ध आहे. ह.जाबीर ﷺ रिवायत करतात की, नबी ﷺ नी, घोड्याचे मांस खाण्याची परवानगी दिली आहे. ''अजिन फी लहुमुल खैल'' (स.बुखारी स. मुस्लिम) या शिवाय सहाबा कराम ﷺ नी, नबी ﷺ च्या उपस्थितीत, खैबर आणि मदिनेत, घोडा जबाह करून, त्याचे मांस शिजविले आणि खाल्ले. आपण ﷺ नी याला मना केले नाही. (कृपया पहावे, स.मुस्लिम, आणि मुसनद अहमद ३ पृष्ठ ३५६) म्हणून धर्मपंडितांचे बाहुल्य, आणि तीन इमाम आणि पूर्वीचे लोक (सल्फ) आणि त्यांच्या मागे येणारे लोक (खल्फ), यांची बहुतायक्ता, घोडा हलाल असण्याला मान्य करते. (तफसीर इब्ने कसीर) येथे घोड्याचा उल्लेख केवळ स्वारीच्या अंतर्गत, यासाठी करण्यात आला आहे की, याचा प्रामुख्याने उपयोग, याच उद्देशाने आहे. तो साऱ्या जगांत नेहमी इतकी अनमोल आणि बहूमूल्य असतो, की खाद्य म्हणून त्याचा उपयोग फारच अल्प होतो. मेंढ्या बकऱ्यांसारखे याला खाण्यासाठी जबाह केले जात नाही. परंतु हा अर्थ नाही की त्याला आधाराशिवाय हराम ठरवून टाकण्यात यावे.

२) जमिनीच्या अगदी खालच्या भागात, अशाचप्रकारे समुद्रात, आणि निर्जल आणि खुष्क, वाळवंटात, आणि जंगलात अल्लाहतआला सृष्टी (जिवधारी) निर्माण करीत राहतो. ज्याचे ज्ञान अल्लाहशिवाय कोणास नाही. आणि यातच माणसाच्या बनविलेल्या त्या वस्तू, पण येऊन जातात, जी अल्लाहने दिलेल्या बुद्धी आणि कौशल्याचा, उपयोग करून, त्याच्याच निर्माण केलेल्या, वस्तूंना, वेगवेगळ्या अंदाजाने जोडून, तो तयार करतो. उदाहरणार्थ, बस,कार,रेल्वे, जहाज आणि विमान, आणि अशा प्रकारच्या अनेक असंख्य, वस्तू. आणि ज्या भविष्यात घडणार आहेत.

३) याचा एक दुसरा अर्थ आहे, ''आणि अल्लाहवरच आहे, सरळ मार्ग'' म्हणजे याचे वर्णन करणे. म्हणून त्याने याला सांगून टाकले, आणि हिदायत आणि गुमराही दोहोंना स्पष्ट करून दिले; म्हणूनच पुढे सांगितले काही मार्ग वाकडे आहेत. म्हणजे मार्गभ्रष्टतेचे आहेत.

४) परंतु, कारण की, याच्यात सक्ती झाली असती, आणि माणसाची परीक्षा झाली नसती; म्हणून अल्लाहने आपल्या मर्जीने, सर्वांना भाग पाडले नाही; किंबहुना दोन्ही मार्ग दाखवून, मनुष्याला विचार करण्याचे आणि अखत्यारीचे स्वातंत्र्य दिले आहे.

५) याच्यात पावसाचे जे फायदे, वर्णन केले गेले आहेत, जो प्रत्येक मनुष्याचा प्रत्यक्ष पाहण्याचा आणि अनुभविण्याचा भाग आहे. त्याच्या स्पष्टीकरणाची आवश्यकता नाही. तसेच त्याचा उल्लेख पूर्वी पण येऊन चुकला आहे.

وَ سَخَّرَ لَكُمُ الَّيْلَ وَالنَّهَارَ ۙ وَالشَّمْسَ وَالْقَمَرَ ؕ وَالنُّجُوْمُ مُسَخَّرٰتٌۢ بِاَمْرِهٖ ؕ اِنَّ فِیْ ذٰلِكَ لَاٰیٰتٍ لِّقَوْمٍ یَّعْقِلُوْنَ ۝١٢

**आणि त्यानेच रात्र, दिवस, आणि सूर्य चंद्राला, तुमच्या कामात लाऊन ठेवले आहे; आणि तारे पण त्याच्या हुकूमाच्या अधिन आहेत. खचित्च यांच्यात, बुद्धीवान लोकांसाठी, कित्येक निशाण्या उपस्थित आहेत[१] ⑫**

وَمَا ذَرَاَ لَكُمْ فِی الْاَرْضِ مُخْتَلِفًا اَلْوَانُهٗ ؕ اِنَّ فِیْ ذٰلِكَ لَاٰیَةً لِّقَوْمٍ یَّذَّكَّرُوْنَ ۝١٣

**आणखीही पुष्कळशा गोष्टी, वेगवेगळ्या रंगारूपाच्या त्याने तुमच्यासाठी जमिनीत पसरून ठेवल्या आहेत. नि:संशय बोध घेणाऱ्यांसाठी, यांच्यात मोठी भारी[२] निशाणी आहे. ⑬**

وَهُوَ الَّذِیْ سَخَّرَ الْبَحْرَ لِتَاْكُلُوْا مِنْهُ لَحْمًا طَرِیًّا وَّ تَسْتَخْرِجُوْا مِنْهُ حِلْیَةً تَلْبَسُوْنَهَا ۚ وَ تَرَى الْفُلْكَ مَوَاخِرَ فِیْهِ وَلِتَبْتَغُوْا مِنْ فَضْلِهٖ وَ لَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ۝١٤

**आणि समुद्रपण त्याने तुम्हाला वश करून दिले आहेत की, त्यांतून निघालेले ताजे ताजे मांस खावे, आणि त्यांच्यातून आपल्या घालण्याचे दागिने काढू शकावे. तुम्ही पाहाल की, नावा त्याच्यात पाणी कापित चालत आहेत. आणि यासाठी सुद्धा, की त्याचे औदार्य शोधावे; आणि होऊ शकते की, तुम्ही त्याचे आभार पण मानावेत[३] ⑭**

وَاَلْقٰى فِی الْاَرْضِ رَوَاسِیَ اَنْ تَمِیْدَ بِكُمْ وَاَنْهٰرًا وَّ سُبُلًا لَّعَلَّكُمْ تَهْتَدُوْنَ ۝١٥

**आणि त्याने जमिनीत पर्वत रोऊन टाकले आहेत, कारण की (पृथ्वी) तुम्हास घेऊन कुठे झुंकू[४] नये. आणि त्यानेच नद्या आणि मार्ग काढले, कारण की तुम्ही आपल्या इच्छित ध्येयापर्यंत पोहोचावे[५] ⑮**

وَعَلٰمٰتٍ ؕ وَبِالنَّجْمِ هُمْ یَهْتَدُوْنَ ۝١٦

**आणखी पण पुष्कळशा निशाण्या, निश्चित केल्यात. आणि ताऱ्यांनी सुद्धा लोक मार्ग प्राप्त करीत असतात ⑯**

اَفَمَنْ یَّخْلُقُ كَمَنْ لَّا یَخْلُقُ ؕ اَفَلَا تَذَكَّرُوْنَ ۝١٧

**तर काय तो, जो निर्माण करतो; त्याच्या सारखा होऊ शकतो, जो निर्माण करू शकत नाही? तर काय तुम्ही जरा सुध्दा विचार करीत नाही[६] ⑰**

१) की कशाप्रकारे रात्र आणि दिवस लहान आणि मोठे होतात; चंद्र आणि सूर्य आपल्या उद्धेशाकडे चालत फिरत आहेत; आणि त्यांच्यात कधी फरक पडत नाही. तारे कशा प्रकारे आकाशाची शोभा आणि रात्रीच्या अंधारांत, वाट चुकलेल्या आणि प्रवाशांकरीता मार्गदर्शक आहेत. हे सर्व अल्लाहतआलाच्या परिपूर्ण सामर्थ्य आणि मोठ्या राज्याला, पुरावादर्शक आहे.

२) म्हणजे जमिनीमध्ये, अल्लाहने जी खनीजे, वनस्पती, निर्जिव अचल वस्तू आणि प्राणी आणि त्यांचे फायदे आणि वैशिष्टये, निर्माण केली आहेत. याच्यांत सुद्धा बोध घेणाऱ्यांसाठी निशाण्या आहेत.

३) याच्यात समुद्राच्या उसळी मारणाऱ्या लाटांना, मानवाच्या अधिन करून देण्याच्या वर्णनांबरोबर, त्याचे तीन फायद्देपण वर्णन केले आहेत. एक हा की तुम्ही त्याच्या मासळीच्या रूपात ताजे मांस खातात, (आणि मासा मृत असला तरी हलाल आहे; याशिवाय एहराम परिधान केलेला असताना सुद्धा, त्याची शिकार करणे हलाल आहे.) दुसरे त्याच्यांतून तुम्ही मोती, शिंपले आणि पांचु काढतात, ज्यांच्यापासून तुम्ही दागिने बनवितात. तिसरे याच्यात तुम्ही नावा आणि जहाज चालवितात, ज्यांच्या मार्फत तुम्ही एका देशातून दुसऱ्या देशात जातात. व्यापारी माल पण घेऊन जातात, घेऊन येतात. ज्यामुळे तुम्हाला अल्लाहची कृपा (नफा) प्राप्त होते; ज्यावर तुम्हाला अल्लाहचे कृतज्ञ व्हावयास हवे.

४) हा पर्वतांचा फायदा वर्णन केला जात आहे, आणि अल्लाहचा एक मोठा उपकार पण. कारण की जर जमीन हलत राहिली असती, तर त्याच्यांत स्थीर रहाणेच शक्य झाले नसते. त्याचा अंदाज त्या भूकंपांनी केला जाऊ शकतो, जे काही सेकंद आणि क्षणाकरीता येतात; परंतु कशाप्रकारे, मोठमोठ्या आणि मजबुत इमारतींना जमिनदोस्त, आणि शहरांना खंडरामध्ये बदलून देतात.

५) नद्यांचे वहाणे पण अजीब आहे; कोठून त्या सुरू होतात, आणि कोठे कोठे उजवीकडे, डावीकडे उत्तर दक्षीण, पूर्व पश्चिम प्रत्येक भागाला पाणी पाजतात, अशाच प्रकारे मार्ग बनविले, ज्यांच्या मार्फत तुम्ही इच्छित स्थळी पोहचतात.

६) या तमाम देणग्यांनी एकेश्वरवादाच्या महत्तेला स्पष्ट केले; की, अल्लाह तर सर्व गोष्टींचा निर्माता आहे. परंतु त्याला सोडून तुम्ही ज्यांची उपासना करीतात, त्यांनीही काही निर्माण केले आहे? नाही!! किंबहुना तेच स्वत: अल्लाहची निर्मिती आहेत. मग बरे, निर्माता आणि निर्मित, कशाप्रकारे समान होऊ शकतात? जेव्हा की, तुम्ही त्यांना, उपास्य बनवून, अल्लाहच्या समान ठरवून ठेवले आहे. काय तुम्ही जरा पण विचार करीत नाही?

وَاِنۡ تَعُدُّوۡا نِعۡمَةَ اللّٰهِ لَا تُحۡصُوۡهَا‌ ؕ اِنَّ اللّٰهَ لَغَفُوۡرٌ رَّحِيۡمٌ ﴿۱۸﴾

आणि जर तुम्ही अल्लाहच्या देणग्या मोजू इच्छाल, तर तुम्ही त्या मोजू शकत नाही. नि:संशय अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. १८

وَاللّٰهُ يَعۡلَمُ مَا تُسِرُّوۡنَ وَمَا تُعۡلِنُوۡنَ ﴿۱۹﴾

आणि जे काही तुम्ही लपवाल आणि उघड कराल, अल्लाहतआला सर्व काही जाणतो[१] १९

وَالَّذِيۡنَ يَدۡعُوۡنَ مِنۡ دُوۡنِ اللّٰهِ لَا يَخۡلُقُوۡنَ شَيۡـًٔا وَّهُمۡ يُخۡلَقُوۡنَ ؕ ﴿۲۰﴾

आणि ज्यांना ज्यांना हे लोक अल्लाहतआलाशिवाय बोलवितात; ते कोण्या वस्तुंला निर्माण करू शकत नाही; किंबहुना ते स्वत: निर्माण केले गेले आहेत २०

اَمۡوَاتٌ غَيۡرُ اَحۡيَآءٍ‌ ۚ وَمَا يَشۡعُرُوۡنَ ۙ اَيَّانَ يُبۡعَثُوۡنَ ؑ ﴿۲۱﴾

मृत आहेत, जिवंत नाहीत. [२] त्यांना याचीपण जाणीव नाही की ते केव्हा उठवून उभे केले जातील[३] २१

اِلٰهُكُمۡ اِلٰهٌ وَّاحِدٌ‌ ۚ فَالَّذِيۡنَ لَا يُؤۡمِنُوۡنَ بِالۡاٰخِرَةِ قُلُوۡبُهُمۡ مُّنۡكِرَةٌ وَّهُمۡ مُّسۡتَكۡبِرُوۡنَ ﴿۲۲﴾

तुम्हा सर्वांचा उपास्य फक्त एकटा अल्लाहतआला आहे; आणि परलोकांवर विश्वास न ठेवणाऱ्यांची मने नाकारणारी आहेत; आणि ते स्वत: गर्वाने भरलेले आहेत[४] २२

لَا جَرَمَ اَنَّ اللّٰهَ يَعۡلَمُ مَا يُسِرُّوۡنَ وَمَا يُعۡلِنُوۡنَ‌ ؕ اِنَّهٗ لَا يُحِبُّ الۡمُسۡتَكۡبِرِيۡنَ ﴿۲۳﴾

कुठल्याही शंका कुशंकेशिवाय, अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीला, जे हे लोक लपवितात, आणि जिला जाहीर करतात, फार चांगल्या प्रकारे जाणतो; तो गर्विष्ठ लोकांना पसंत करीत नाही[५] २३

وَاِذَا قِيۡلَ لَهُمۡ مَّاذَاۤ اَنۡزَلَ رَبُّكُمۡ‌ ۙ قَالُوۡۤا اَسَاطِيۡرُ الۡاَوَّلِيۡنَ ۙ ﴿۲۴﴾

आणि यांना जेव्हा विचारण्यात येते की, तुमच्या पालनकर्त्याने काय अवतरीत केले आहे? तर उत्तर देतात की, त्या पूर्वीच्या लोकांच्या गोष्टी होत[६] २४

१) आणि याच्याप्रमाणे तो कयामतच्या दिवशी, प्रतिफळ आणि शिक्षा देणार, पुण्यवानांना पुण्याचा बदला आणि पाप्याला त्याच्या पापाची शिक्षा.

२) मृत्यूने अभिप्रेत तो दगडपण आहे, जो निर्जिव आणि नासमझ आहे. आणि मृत्यू पावलेली पुण्यवान माणसे सुद्धा आहेत. कारण मृत्यूनंतर उठवून उभे केले जाणे, (ज्यांची त्यांना जाणीव नाही) हे तर दगडांऐवजी पुण्यवानांवरच, लागू होऊ शकते. त्यांना फक्त मृतच नाही म्हटले, किंबहुना आणखी खुलासा करून दिला की, ''ते जिवंत नाहीत.'' याच्याने कबर पुजकांचे पण स्पष्ट खंडन होऊन जाते. जे म्हणतात की, कबरीमध्ये दफन झालेले मृत नाहीत, जिवंत आहेत. आणि आम्ही जिवंताचा धांवा करीत आहोत. अल्लाहतआलाच्या या विधानाने, ठाऊक झाले की, मृत्यू पावल्यानंतर ऐहिक जीवन कोणाच्या नशिबांत नसते. न या जगाशी त्यांचा काही संबंध बाकी असतो.

३) मग याच्यांने नफ्याची व पुण्यफळ आणि बदल्याची, अपेक्षा कशी केली जाऊ शकते?

४) म्हणजे एका उपास्याला मानणे, नाकारण्यासाठी आणि मुशरिकीनसाठी, फार कठिण आहे. ते म्हणतात, ''याने सर्व उपास्यांना, एकच उपास्य बनवून टाकले आहे; ही तर मोठीच विचित्र गोष्ट आहे.'' (सू. सॉद - ५) दुसऱ्या ठिकाणी सांगितले , ''जेव्हा एका अल्लाहचा उल्लेख केला जातो, तेव्हा परलोकाला नाकारणाऱ्यांची मने, आकुंचित होऊन जातात; आणि जेंव्हा अल्लाहच्या शिवाय दुसऱ्या उपास्यांचा उल्लेख केला जातो, तर आनंदित होऊन जातात (सू. जुमर-४५)

५) 'इस्तकबार' चा अर्थ होतो आपल्या स्वत:ला मोठे समजत, बरोबर आणि सत्य गोष्टीला नाकारून टाकणे. आणि दुसऱ्यांना क्षुल्लक आणि हीन समजणे. गर्वाची हीच व्याख्या हदीसमध्ये केली गेली आहे. (स.मुस्लीम) हा अहंकार आणि गर्व अल्लाहला फारच नापसंत आहे. हदीसमध्ये आहे तो मनुष्य स्वर्गात जाणार नाही, ज्याच्या मनांत एका कणाएवढा पण गर्व असेल. (हवाला वरील)

६) म्हणजे दुर्लक्ष करीत आणि टर उडवीत, हे खोटे ठरविणारे उत्तर देतात; अल्लाहतआलाने तर काही अवतरीत केले नाही, आणि हा मोहम्मद (ﷺ) आम्हास जे वांचवून ऐकवितो, त्या तर पहिल्या लोकांच्या गोष्टी आहेत, ज्या कोठून तरी ऐकून सांगून देतो.

لِيَحۡمِلُوٓاْ أَوۡزَارَهُمۡ كَامِلَةٗ يَوۡمَ ٱلۡقِيَٰمَةِ وَمِنۡ أَوۡزَارِ ٱلَّذِينَ يُضِلُّونَهُم بِغَيۡرِ عِلۡمٍۗ أَلَا سَآءَ مَا يَزِرُونَ ٢٥

याचा परिणाम होईल की, कयामतच्या दिवशी, हे लोक आपल्या संपूर्ण ओझ्याबरोबरच, त्यांच्या ओझ्याचेपण भागीदार होतील, ज्यांना अज्ञानाने मार्गभ्रष्ट करीत राहिले आहेत. पहा तर, कसे वाईट ओझे उचलत आहेत[१] २५

قَدۡ مَكَرَ ٱلَّذِينَ مِن قَبۡلِهِمۡ فَأَتَى ٱللَّهُ بُنۡيَٰنَهُم مِّنَ ٱلۡقَوَاعِدِ فَخَرَّ عَلَيۡهِمُ ٱلسَّقۡفُ مِن فَوۡقِهِمۡ وَأَتَىٰهُمُ ٱلۡعَذَابُ مِنۡ حَيۡثُ لَا يَشۡعُرُونَ ٢٦

यांच्या पूर्वीच्या लोकांनी पण मक्र केले होते, सर शेवटी, अल्लाहाने त्यांच्या इमारतींना मुळांपासून उपटून टाकले आणि त्यांच्या (डोक्यावर) त्यांची छते वरून[२] येऊन पडलीत; आणि त्यांच्याजवळ शिक्षा, तेथून आली, जेथून त्यांच्या कल्पनेत पण नव्हते[३] २६

ثُمَّ يَوۡمَ ٱلۡقِيَٰمَةِ يُخۡزِيهِمۡ وَيَقُولُ أَيۡنَ شُرَكَآءِيَ ٱلَّذِينَ كُنتُمۡ تُشَٰٓقُّونَ فِيهِمۡۚ قَالَ ٱلَّذِينَ أُوتُواْ ٱلۡعِلۡمَ إِنَّ ٱلۡخِزۡيَ ٱلۡيَوۡمَ وَٱلسُّوٓءَ عَلَى ٱلۡكَٰفِرِينَ ٢٧

मग कयामतच्या दिवशी पण अल्लाहतआला त्यांना फजित करेल; आणि म्हणेल, माझे ते सरकतदार कोठे आहेत? ज्यांच्या बाबतीत तुम्ही लढत झगडत होता.[४] ज्यांना ज्ञान दिले गेले होते, ते उत्तर देतील,[५] आज रोजी तर काफिरांना फजिती आणि खराबी, चिकटून गेली. २७

ٱلَّذِينَ تَتَوَفَّىٰهُمُ ٱلۡمَلَٰٓئِكَةُ ظَالِمِيٓ أَنفُسِهِمۡۖ فَأَلۡقَوُاْ ٱلسَّلَمَ مَا كُنَّا نَعۡمَلُ مِن سُوٓءِۭۚ بَلَىٰٓ إِنَّ ٱللَّهَ عَلِيمُۢ بِمَا كُنتُمۡ تَعۡمَلُونَ ٢٨

ते जे आपल्या जीवावर जुलूम करीत राहिले, देवदूत जेव्हा त्यांचे प्राण हरण करू लागले, त्यावेळी त्यांनी समेट करण्याची गोष्ट काढली; की आम्ही वाईट (कृत्ये) करीत नव्हतो.[६] का नाही? अल्लाहतआला खूप जाणणारा आहे, जे काही तुम्ही करीत होता[७] २८

१) म्हणजे त्यांच्या तोंडाने, अल्लाहतआलाने ही गोष्ट काढली, कारण की त्यांनी आपल्या ओझ्याबरोबर, दुसऱ्यांचे ओझेपण उचलावे. ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे; नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''ज्याने लोकांना हिदायतकडे बोलाविले, तर त्या माणसाला, त्या तमाम लोकांचा बदलापण मिळेल, जे याच्या आमंत्रणावर हिदायतचा मार्ग स्वीकारतील; आणि ज्याने मार्गभ्रष्टतेकडे बोलाविले, तर त्याला त्या सर्व लोकांच्या पापांचे ओझेपण उचलावे लागेल; जे याच्या आमंत्रणावर मार्गभ्रष्ट झालेत. (अबु दाऊद, किताबुल सुन्नत बाब जुमल सुन्नत)

२) काही भाष्यकारांच्या मते, ही एक उपमा आहे; ज्याच्याने हे दाखविण्याचा उद्देश्य आहे, की, अल्लाहच्या बरोबर कुफ्र आणि शिर्क करणाऱ्यांची कर्मे अशा प्रकारे बरबाद होतील, ज्याप्रमाणे कोणाच्या घराचा पाया खिळखिळा होऊन जावा; आणि ते छतासह कोसळून पडावा, परंतु जास्त बरोबर ही गोष्ट आहे की, याच्याने उद्देश्य, त्या लोकांच्या परिणामाकडे इशारा करणे आहे, ज्या लोकांनी पैगंबरांच्या खोटे ठरविण्यावर आग्रह धरून ठेवला; आणि सरशेवटी अल्लाहच्या शिक्षेत पकडले जाऊन, आपल्या घरासह नष्ट होऊन गेलेत. उदाहरणार्थ, आदचे लोक आणि लूतचे लोक, वगैरे.

३) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''मग अल्लाह (ची शिक्षा) त्यांच्या जागी अशा ठिकाणाहून आली, जेथून त्यांना गुमान पण नव्हता.'' (सू. हशर-२)

४) म्हणजे या तर त्या शिक्षा होत्या, त्या जगात ज्यांच्यावर आल्यात; आणि कयामतच्या दिवशी अल्लाहतआला त्यांना अशा प्रकारे अप्रतिष्ठीत आणि फजीत करेल की, त्यांना विचारील, ''तुमचे ते सरकतदार कोठे आहेत, जे तुम्ही माझ्यासाठी ठरवून ठेविले होते; आणि ज्यांच्यामुळे तुम्ही ईमानवाल्यांशी लढत झगडत होते.

५) म्हणजे ज्यांना धर्माचे ज्ञान होते, आणि धर्मावर कायम होते; ते उत्तर देतील.

६) हे मुशरिक जुलूमी लोकांच्या मृत्यूच्या वेळीची अवस्था वर्णन करण्यात येत आहे; जेव्हा देवदूत त्यांचे प्राण हरण करतात. तेव्हा ते समेटाच्या गोष्टी करतात. म्हणजे ऐकणे आणि मान्य करणे, आणि नम्रता दाखवित, म्हणतात की, आम्ही तर काही वाईट गोष्टी करीत नव्हतो. ज्याप्रमाणे हशरच्या मैदानात, अल्लाहच्या समक्षपण, खोट्या शपथा वाहतील आणि म्हणतील, ''अल्लाहची शपथ! आम्ही मुशरिक नव्हतो.'' (सू. अन्आम-२३) दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''ज्या दिवशी अल्लाहतआला, त्या सर्वांना एकत्र गोळा करून आपल्याजवळ जमा करील तेव्हा अल्लाहच्या समोरपण, ते अशाचप्रकारे खोट्या शपथा घेतील, ज्याप्रमाणे तुमच्यासमोर शपथा खात आहेत.'' (सू. मुजादिला-१८)

७) देवदूत उत्तर देतील, का नाही? म्हणजे तुम्ही खोटे बोलत आहात; तुमचे तर सर्व आयुष्यच वाईट कृत्यात गेलेले आहे. आणि अल्लाहजवळ तुमच्या सर्व कर्मांचा रेकार्ड सुरक्षित आहे. तुमच्या या नाकारण्याने आता काय होईल?

فَادْخُلُوٓا اَبْوَابَ جَهَنَّمَ خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ فَلَبِئْسَ
مَثْوَى الْمُتَكَبِّرِيْنَ ﴿٢٩﴾

**बस, आतातर तुम्ही नेहमी करीता, नरकाग्नीच्या दरवाज्यातून, (नरकाग्नीत) दाखल व्हा.[१] तर (ही) किती वाईट जागा आहे, गर्व करणाऱ्यांची २९**

وَقِيْلَ لِلَّذِيْنَ اتَّقَوْا مَاذَآ اَنْزَلَ رَبُّكُمْ ؕ قَالُوْا
خَيْرًا ؕ لِلَّذِيْنَ اَحْسَنُوْا فِيْ هٰذِهِ الدُّنْيَا حَسَنَةٌ ؕ
وَلَدَارُ الْاٰخِرَةِ خَيْرٌ ؕ وَلَنِعْمَ دَارُ الْمُتَّقِيْنَ ﴿٣٠﴾

**आणि जे लोक अल्लाहला भितात, त्यांना विचारण्यात येते की, तुमच्या पालनकर्त्याने काय अवतरीत केले आहे? तर ते उत्तर देतात की, उत्तमात उत्तम, ज्या लोकांनी चांगली कामे केली, त्यांच्यासाठी या जगांत भलाई आहे; आणि खचित्‌च परलोकाचे घर तर फारच उत्तम आहे. आणि किती उत्तम, अल्लाहला भिणाऱ्याचे घर आहे. ३०**

جَنّٰتُ عَدْنٍ يَّدْخُلُوْنَهَا تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ
لَهُمْ فِيْهَا مَا يَشَآءُوْنَ ؕ كَذٰلِكَ يَجْزِي اللّٰهُ
الْمُتَّقِيْنَ ﴿٣١﴾

**नित्य राहण्याच्या बागा, जेथे ते जातील, ज्यांच्याखाली नद्या वाहत आहेत. जे काही हे मागतील, तेथे त्यांच्यासाठी हजर असेल. अल्लाहला भिणाऱ्यांना, अल्लाहतआला अशाचप्रकारे बदला देत असतो. ३१**

الَّذِيْنَ تَتَوَفّٰىهُمُ الْمَلٰٓئِكَةُ طَيِّبِيْنَ ۙ يَقُوْلُوْنَ
سَلٰمٌ عَلَيْكُمُ ۙ ادْخُلُوا الْجَنَّةَ بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ﴿٣٢﴾

**ते, ज्यांचे प्राण, देवदूत, अशा अवस्थेत हरण करतात की ते पाक साफ असतात; (देवदूत) म्हणतात की तुमच्यासाठी, अभयच अभय आहे, स्वर्गांत जा, आपल्या त्या कर्मांच्या बदल्यात, जे तुम्ही करीत होता[२] ३२**

هَلْ يَنْظُرُوْنَ اِلَّآ اَنْ تَأْتِيَهُمُ الْمَلٰٓئِكَةُ اَوْ يَاْتِيَ
اَمْرُ رَبِّكَ ؕ كَذٰلِكَ فَعَلَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ ؕ
وَمَا ظَلَمَهُمُ اللّٰهُ وَلٰكِنْ كَانُوْٓا اَنْفُسَهُمْ يَظْلِمُوْنَ ﴿٣٣﴾

**काय हे या गोष्टीची वाट पाहत आहेत की, त्यांच्याजवळ देवदूत येऊन लागावेत, किंवा तुझ्या पालनकर्त्याचा हुकूम येऊन पोहचवा [३]? असेच या लोकांनी पण केले होते, जे यांच्यापूर्वी [४] होते; यांच्यावर अल्लाहतआलाने काहीच जुलूम केला [५] नाही; किंबहुना तेच आपल्या जिवावर जुलूम करीत राहिले. [६] ३३**

१) इमाम इब्ने कसीर म्हणतात, यांच्या मृत्यूनंतर लगेच, यांचे प्राण नरकाग्नीमध्ये चालले जातात; आणि यांची शरीरे कबरीत राहतात. (जेथे अल्लाहतआला आपल्या परीपूर्ण सामर्थ्याने, शरीर आणि प्राणात, अंतर असून सुद्धा, त्यांच्यात कशाही प्रकारे, संबंध जोडून, त्यांना शिक्षा देतो आणि सकाळ संध्याकाळ, त्यांच्यावर आग सादर केली जाते.) मग जेव्हा कयामत येऊन धडकेल, तर त्यांचे आत्मे, त्यांच्या शरीरात परतून येतील, आणि नेहमी करीता हे, नरकागनीमध्ये दाखल करून दिले जातील.

२) या महावाक्यामध्ये, जुलूमी मुशरिकांच्या तुलनेत, ईमान आणि ईशभय बाळगणाऱ्यांचे कर्तृत्व, आणि त्यांचा सुपरिणाम, वर्णन करण्यात आला आहे. जअलनल्लाहु मिनहुम आमिन! या रब्बल आलमीन.

३) सू. अअराफ-४३ च्या भाष्यामध्ये ही हदीस येऊन चुकली आहे की, कोणी मनुष्य पण केवळ आपल्या कर्माने, स्वर्गांत जाणार नाही; जो पर्यंत अल्लाहची दया होणार नाही. परंतु येथे हे सांगण्यात येत आहे की, तुम्ही आपल्या कर्मांच्या बदल्यात स्वर्गांत दाखल होऊन जा. तर याच्यात मुळात काही विरोधाभास नाही; कारण की अल्लाहच्या दयेला प्राप्त करण्यासाठी चांगली कर्मे आवश्यक आहेत. जणू चांगली कर्मे, अल्लाहच्या दयेचे साधन आहे. म्हणून कर्माचे महत्त्व सुद्धा स्वत:च सिद्ध आहे. याच्याकडे डोळे झांक करता येऊ शकत नाही. याच्याशिवाय परलोकांत, अल्लाहची दया मिळवूच शकत नाही. म्हणून उल्लेखित केलेल्या हदीसचा भावार्थ पण, आपल्या जागी बरोबर आहे. आणि कर्माचे महत्त्व पण आपल्या जागी कायम आहे. यासाठी एका आणखी हदीसमध्ये फर्माविले, ''नि:संशय अल्लाहतआला, तुमच्या सुरतीला आणि संपत्तीला पाहत नाही; परंतु तो तुमच्या अंत:करणाला आणि कर्मांना पाहतो.'' (स.मुस्लिम)

४) म्हणजे, काय हे पण त्यावेळेची वाट पहात आहेत, जेव्हा देवदूत त्यांचे प्राण हरण करतील, किंवा पालनकर्त्याचा हुकूम (म्हणजे शिक्षा किंवा कयामत) येऊन जाईल.

५) म्हणजे अशा प्रकारे शिरजोरी आणि पापआचरण, यांच्या पूर्वींच्या लोकांनी, अंगिकारून ठेवले, ज्यामुळे ते अल्लाहच्या कोपाला पात्र ठरले.

६) यासाठी की अल्लाहने यांच्यासाठी काही सबब शिल्लक ठेवली नाही. पैगंबरांना पाठवून आणि पुस्तके अवतरीत करून, त्यांच्यावर तर्क पूर्ण करून दिला.

७) म्हणजे पैगंबरांचा विरोध आणि त्यांना खोटे ठरवून स्वत:च त्यांनी आपल्यावर जुलूम केला.

मग त्यांच्या वाईट कर्माचे परिणाम त्यांना मिळून गेले आणि ज्याचे ते हंसे उडवित होते; ते त्यांच्यावरच उलटून पडले[१] ३४

فَأَصَابَهُمْ سَيِّئَاتُ مَا عَمِلُوا وَحَاقَ بِهِم مَّا كَانُوا بِهِ يَسْتَهْزِءُونَ ۝٣٤

आणि मुशरिक लोकांनी म्हटले की जर अल्लाहतआला इच्छिता तर, आम्ही आणि आमचे वाड वडील त्याच्याशिवाय आणखी कोणाची उपासनाच न करते, न त्याच्या हुकूमाशिवाय कोण्या वस्तुला हराम ठरविते; हेच वर्तन, यांच्यापूर्वीच्या लोकांचे राहिले; तर पैगंबरावर तर फक्त आणि उघड उघड संदेशाचे पोहचून देणे आहे.[२] ३५

وَقَالَ الَّذِينَ أَشْرَكُوا لَوْ شَاءَ اللَّهُ مَا عَبَدْنَا مِن دُونِهِ مِن شَيْءٍ نَّحْنُ وَلَا آبَاؤُنَا وَلَا حَرَّمْنَا مِن دُونِهِ مِن شَيْءٍ ۚ كَذَٰلِكَ فَعَلَ الَّذِينَ مِن قَبْلِهِمْ ۚ فَهَلْ عَلَى الرُّسُلِ إِلَّا الْبَلَاغُ الْمُبِينُ ۝٣٥

आम्ही प्रत्येक जनसमूहात पैगंबर पाठविला की, (लोकांनो!) फक्त अल्लाहचीच उपासना करा. आणि त्याच्याशिवाय सर्व उपास्यांपासून वांचा; मग काही लोकांना तर अल्लाहतआलाने हिदायत दिली; आणि काहींवर मार्गभ्रष्ट होऊन जाणे सिद्ध होऊन गेले;[३] तर तुम्ही स्वत: जमिनीत चालून फिरून बघून घ्या; खोटे ठरविणाऱ्यांचा परिणाम कसा काय झाला? ३६

وَلَقَدْ بَعَثْنَا فِي كُلِّ أُمَّةٍ رَّسُولًا أَنِ اعْبُدُوا اللَّهَ وَاجْتَنِبُوا الطَّاغُوتَ ۖ فَمِنْهُم مَّنْ هَدَى اللَّهُ وَمِنْهُم مَّنْ حَقَّتْ عَلَيْهِ الضَّلَالَةُ ۚ فَسِيرُوا فِي الْأَرْضِ فَانظُرُوا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُكَذِّبِينَ ۝٣٦

जरी आपण यांच्या हिदायतचे इच्छुक असाल, परंतु अल्लाहतआला त्याला हिदायत देत नसतो, ज्याला आडमार्गी भटकवून देईल, आणि न त्यांचा कोणी मददगार असतो.[४] ३७

إِن تَحْرِصْ عَلَىٰ هُدَاهُمْ فَإِنَّ اللَّهَ لَا يَهْدِي مَن يُضِلُّ ۖ وَمَا لَهُم مِّن نَّاصِرِينَ ۝٣٧

१) म्हणजे जेव्हा पैगंबर त्यांना म्हणत की, जर तुम्ही ईमान आणले नाही, तर अल्लाहची शिक्षा येऊन लागेल. तेव्हा ते टर उडवीत म्हणत की, जा आपल्या अल्लाहला सांगून दे की, तो आम्हांस शिक्षा पाठवून नष्ट करून टाकील. म्हणून त्या शिक्षेने त्यांना घेरून टाकले, ज्याची ते टर उडवीत होते. मग त्यापासून वांचण्याचा कुठलाही मार्ग त्यांच्याजवळ राहिला नाही.

२) या महावाक्यात अल्लाहतआलाने मुशरिकीनच्या एका शंका आणि चुकीचे निर्सन केले आहे. ते म्हणत असत की, आम्ही अल्लाहला सोडून, दुसऱ्यांची उपासना करतो, किंवा त्याच्या हुकूमाशिवाय, काही वस्तूंना हराम करून घेतो, जर आमच्या या गोष्टी चूक आहेत, तर अल्लाहतआला आपल्या परिपूर्ण सामर्थ्याने, आम्हास या गोष्टीपासून का रोकून देत नाही? तो जर इच्छिल तर आम्ही या गोष्टी करूच शकणार नाही. जर तो रोकत नाही, तर त्याचा अर्थ आहे की, आम्ही जे काही करीत आहोत, त्याच्या मर्जीनुसार आहे. अल्लाहतआलाने त्यांच्या या शंकेचे निरसन, ''पैगंबरांचे काम फक्त पोहचवून देणे आहे.'' सांगून करून टाकले. अर्थ हा आहे की, तुमचे गुमान बरोबर नाही, की अल्लाहतआलाने तुम्हास यापासून मना केले नाही. अल्लाहतआलाने तुम्हास या शिर्कच्या कामांपासून मोठ्या सक्तीने मना केले आहे. याच करता तो प्रत्येक समाजांत पैगंबर पाठवितो, आणि पुस्तके अवतरीत करीत राहिला आहे. आणि प्रत्येक पैगंबराने येऊन, सर्वांत प्रथम, आपल्या समाजाला शिर्कपासून वांचविण्याचा प्रयत्न केला आहे. याचा स्पष्ट अर्थ हा आहे की, अल्लाहतआला कधीच हे पसंत करीत नाही, की लोकांनी शिर्क करावे. कारण की जर त्याला हे पसंत असते, तर त्याच्या खंडनार्थ त्याने पैगंबर का पाठविले असते? परंतु असे असून सुद्धा, जर तुम्ही पैगंबरांना खोटे ठरवून शिर्कचा मार्ग अंगिकारला; आणि अल्लाहतआलाने, आपल्या निर्माण करण्याच्या मर्जीच्या अंतर्गत कडक होऊन जबरदस्तीने, तुम्हास यापासून रोकले नाही, तर हा त्याच्या बुद्धीचा आणि प्रयोजनाचा एक भाग आहे; ज्याच्या अंतर्गत त्याने माणसांना इरादा आणि अंगिकारण्याचे स्वातंत्र्य दिले आहे कारण की, याच्याशिाय त्यांची परीक्षा होणे शक्यच नव्हते. आमचे पैगंबर आमचा संदेश, तुमच्यापर्यंत पोहचवून, हेच बजावित राहिले की, या स्वातंत्र्याचा चुकीचा वापर करू नका; किंबहुना अल्लाहच्या इच्छेप्रमाणे, त्याचा उपयोग करा. आमचे पैगंबर हेच काही करू शकत होते; जे त्यांनी केले. आणि तुम्ही शिर्क करून, स्वातंत्र्याचा चुकीचा उपयोग केला; ज्याची शिक्षा, कायमचा अजाब आहे.

३) चर्चित शंकेच्या निर्सनाकरता, पुढे आणखी सांगितले की, प्रत्येक जनसमूहांत पैगंबर पाठविला; आणि हा संदेश त्यांच्यामार्फत पाठविला की, फक्त एका अल्लाहची उपासना करा. परंतु ज्यांच्यावर मार्गभ्रष्ट होणे सिद्ध होऊन चुकले होते, त्यांनी याची जराही पर्वा केली नाही.

४) यात अल्लाह फर्मावित आहे, हे पैगंबरा! तुझी इच्छा, खचित्च ही आहे की, या सर्वांनी हिदायतचा मार्ग अंगिकारून घ्यावा; परंतु अल्लाहच्या कायद्याच्या अंतर्गत, जे मार्गभ्रष्ट होऊन गेले आहेत, त्यांना तू हिदायतच्या मार्गावर चालवू शकत नाही. ते तर आपल्या शेवटच्या परिणामाला पोहचूनच राहतील, जेथे त्यांचा कोणी मदत करणारा नसेल.

وَأَقْسَمُوا بِاللَّهِ جَهْدَ أَيْمَانِهِمْ ۙ لَا يَبْعَثُ اللَّهُ مَن يَمُوتُ ۚ بَلَىٰ وَعْدًا عَلَيْهِ حَقًّا وَلَٰكِنَّ أَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُونَ ﴿٣٨﴾

**आणि ते लोक मोठ्या कडक कडक शपथा घेऊन, घेऊन म्हणतात की, मृतांना अल्लाहतआला जिवंत करणार नाही. [१] का नाही? अवश्य जिवंत करील. हा तर त्याचा खराखरा शाश्वत, वायदा आहे. परंतु बहुतेक लोक समजत [२] नाही. (३८)**

لِيُبَيِّنَ لَهُمُ الَّذِي يَخْتَلِفُونَ فِيهِ وَلِيَعْلَمَ الَّذِينَ كَفَرُوا أَنَّهُمْ كَانُوا كَاذِبِينَ ﴿٣٩﴾

**यासाठी पण की, हे लोक ज्या गोष्टीत मतभेद करीत होते, त्याला अल्लाहतआलाने स्पष्ट (जाहीर) करून द्यावे. आणि यासाठी सुद्धा की, स्वत: काफिरांनी आपले खोटे होणे जाणून घ्यावे [३] (३९)**

إِنَّمَا قَوْلُنَا لِشَيْءٍ إِذَا أَرَدْنَاهُ أَن نَّقُولَ لَهُ كُن فَيَكُونُ ﴿٤٠﴾

**आम्ही जेव्हा कोण्या वस्तुचा इरादा करतो, तर फक्त आमचे हे सांगून टाकणे असते की, होऊन जा! ती होऊन जाते [४] (४०)**

وَالَّذِينَ هَاجَرُوا فِي اللَّهِ مِن بَعْدِ مَا ظُلِمُوا لَنُبَوِّئَنَّهُمْ فِي الدُّنْيَا حَسَنَةً ۖ وَلَأَجْرُ الْآخِرَةِ أَكْبَرُ ۚ لَوْ كَانُوا يَعْلَمُونَ ﴿٤١﴾

**आणि ज्या लोकांनी जुलूम सहन केल्यानंतर, अल्लाहच्या मार्गांत आपली जन्मभूमी [५] सोडली आहे, आम्ही त्यांना उत्तमात उत्तम स्थान या जगांत प्रदान करू; [६] आणि परलोकातील प्रतिफळ तर फारच मोठे [७] आहे; जर हे या गोष्टीला जाणते (४१)**

الَّذِينَ صَبَرُوا وَعَلَىٰ رَبِّهِمْ يَتَوَكَّلُونَ ﴿٤٢﴾

**ते, ज्यांनी सहनशिलता सोडली नाही, आणि आपल्या पालनकर्त्यावरच पूर्ण भरोसा करीत राहिले. (४२)**

१) कारण की मातीत मिसळून गेल्यानंतर, त्यांचे दुसऱ्यादा जिवंत होऊन उठणे, त्यांना कठीण आणि अशक्य वाटत होते. म्हणूनच पैगंबर जेव्हा त्यांना, मृत्यूनंतर जिवंत उठण्याच्या बाबतीत सांगत आहे; तर त्याला खोटे ठरवित आहे. त्याला मान्य करीत नाही; किंबहुना, याच्या उलट म्हणजे दुसऱ्यांदा जिवंत न होण्यावर शपथा घेत आहेत; शपथा पण मोठ्या ताकीद आणि विश्वासासह.

२) या अडाणपणा आणि अज्ञानामुळे, पैगंबरांन खोटे ठरवितात आणि त्यांना विरोध करतात. आणि कुफ्रमध्ये, रहातात.

३) हे कयामतच्या कायम होण्याचे प्रयोजन आणि कारण वर्णन केले जात आहे; की त्या दिवशी अल्लाहतआला, त्या गोष्टींमध्ये फैसला करून टाकेन, ज्यात लोक जगात मतभेद करीत होते; आणि सत्यवादींना आणि अल्लाहला भिणाऱ्यांना, चांगले प्रतिफल, आणि कुफ्रवाल्यांना आणि आज्ञाभंजकांना, त्यांच्या वाईट कर्मांची शिक्षा देईल. तसेच या कुफ्रवाल्यावर पण ही गोष्ट जाहीर होऊन जाईल, की ते कयामतच्या घडून न येण्यावर शपथा वाहत होते त्यात ते खोटे होते.

४) म्हणजे लोकांच्या जवळ कयामतचे होणे, कितीही कठीण आणि अशक्य असेल, परंतु अल्लाहसाठी तर मुळीच कठीण नाही. त्याला पृथ्वी आकाशाला ढासळून टाकण्यासाठी, मजुर, इंजिनिअर, गवंडी आणि दुसरी साधन सामुग्री, यांची आवश्यकता नाही. त्याला तर फक्त शब्द 'कुन्' म्हणणे आहे. त्याच्या शब्द 'कुन्' ने क्षणार्धांत कयामत घडून येईल. ''कयामतचा मामला पापणी लवतांच, किंवा त्याच्यापेक्षाही कमी मुदतीत, घडून येईल.'' (सू. नहल-७७)

५) 'हिजरत' चा अर्थ आहे, अल्लाहच्या धर्मासाठी, अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी, आपली जन्मभूमी, आपले नातेवाईक, आणि मित्र मंडळी सोडून अशा इलाख्यात चालले जाणे,जेथे सहजरीत्या अल्लाहच्या धर्मावर अंमलबजावणी होऊ शकेल. या महावाक्यात याच स्वदेश त्याग करण्याचे श्रेष्ठत्व, वर्णन करण्यात आले आहे. हे महावाक्य सर्वसाधारण आहे, जे सर्व स्वदेश त्याग करणाऱ्यांना संम्मिलीत करते. आणि हे पण संभव आहे की, हे त्या मुहाजिरीनच्या बाबतीत, अवतरीत झाले असावे, जे आपल्या लोकांच्या त्रास देण्याला कंटाळून, हबशाला हिजरत करून गेले होते. यांची संख्या स्त्रियांसह, शंभर किंवा या पेक्षांजास्त होती. ज्यात ह.उस्मान गनी ﵁ आणि त्यांची पत्नी, मोहम्मद पैगंबर ﷺ ची कन्या ह.रूकैय्या पण होती. (रजी. अल्लाहु अनहुम)

६) याच्याने चोखी रोजी, आणि काहींनी मदीना अभिप्रेत धरले आहे; जे मुसलमानांचे मध्यवर्ती केंद्र बनले, इमाम इब्ने कसीर म्हणतात, दोन्ही म्हणण्यात फरक नाही. यासाठी की, ज्या लोकांनी आपले व्यवहार, व घरदार सोडून हिजरत केली होती, अल्लाहतआलाने त्यांना या जगांतच, चांगला बदला देऊन टाकला; हलाल रोजीपण दिली; आणि संपूर्ण अरब जगतावर त्यांना सत्ता आणि वर्चस्व प्रदान केले.

७) ह.उमर ﵁ नी जेव्हा, मुहाजिरीन आणि अन्सारचे मानधन निश्चित केलेत, तर प्रत्येक मुहाजिरला मानधन देतांना सांगितले,''हे ते आहे, ज्याचा अल्लाहने या जगात वायदा केलेला आहे.''आणि परलोकांत, तुझ्याकरीता जे संचित आहे, ते याच्यापेक्षा कितीतरी उत्तम आहे.'' (इब्ने कसीर)

وَمَاۤ اَرۡسَلۡنَا مِنۡ قَبۡلِكَ اِلَّا رِجَالًا نُّوۡحِىۡۤ اِلَيۡهِمۡ فَسۡـَٔلُوۡۤا اَهۡلَ الذِّكۡرِ اِنۡ كُنۡتُمۡ لَا تَعۡلَمُوۡنَ ﴿۴۳﴾

**आणि आपल्यापूर्वी आम्ही माणसांनाच (पैगंबर बनवून) पाठवत राहिलो, ज्यांच्याकडे आम्ही 'वह्य' अवतरीत करीत असू; जर तुम्ही जाणत नाही तर, ज्ञानी लोकांना विचारून [१] घ्या. (४३)**

بِالۡبَيِّنٰتِ وَالزُّبُرِ‌ؕ وَاَنۡزَلۡنَاۤ اِلَيۡكَ الذِّكۡرَ لِتُبَيِّنَ لِلنَّاسِ مَا نُزِّلَ اِلَيۡهِمۡ وَلَعَلَّهُمۡ يَتَفَكَّرُوۡنَ ﴿۴۴﴾

**प्रमाणे आणि पुस्तकांसह; आणि हे स्मरण (पुस्तक) आम्ही आपल्याकडे उतारले आहे की, लोकांकडे जे अवतरीत झाले आहे, की आपण त्याला स्पष्ट स्पष्ट वर्णन करून सांगून टाकावे की, कदाचित त्यांनी चिंतन आणि मनन करावे. (४४)**

اَفَاَمِنَ الَّذِيۡنَ مَكَرُوا السَّيِّاٰتِ اَنۡ يَّخۡسِفَ اللّٰهُ بِهِمُ الۡاَرۡضَ اَوۡ يَاۡتِيَهُمُ الۡعَذَابُ مِنۡ حَيۡثُ لَا يَشۡعُرُوۡنَ ۙ﴿۴۵﴾

**वाईट वाईट कारस्थाने करणारे काय या गोष्टीकडून निर्भय होऊन गेले आहेत की, अल्लाह त्यांना जमिनीत धसवून टाकेल; किंवा त्यांच्याजवळ अशा ठिकाणाहून, शिक्षा येऊन पोहचेल, जेथून त्यांना गुमानपण नसेल (४५)**

اَوۡ يَاۡخُذَهُمۡ فِىۡ تَقَلُّبِهِمۡ فَمَا هُمۡ بِمُعۡجِزِيۡنَ ۙ﴿۴۶﴾

**किंवा त्यांना चालता फिरतांना पकडून [२] घेईल; हे कुठल्याही प्रकारे अल्लाहला भाग पाडू शकत नाही. (४६)**

اَوۡ يَاۡخُذَهُمۡ عَلٰى تَخَوُّفٍ ؕ فَاِنَّ رَبَّكُمۡ لَرَءُوۡفٌ رَّحِيۡمٌ ﴿۴۷﴾

**किंवा त्यांना धाक भीती दाखवून पकडून घेईल. [३] तर खचित्‌च तुमचा पालनकर्ता फारच करूणाशील आणि दयाळू आहे. [४] (४७)**

اَوَلَمۡ يَرَوۡا اِلٰى مَا خَلَقَ اللّٰهُ مِنۡ شَىۡءٍ يَّتَفَيَّؤُا ظِلٰلُهٗ عَنِ الۡيَمِيۡنِ وَالشَّمَآٮِٕلِ سُجَّدًا لِّلّٰهِ وَهُمۡ دٰخِرُوۡنَ ﴿۴۸﴾

**काय त्यांनी अल्लाहच्या सृष्टीमधून, कोणालाच पाहिले नाही? की त्यांच्या सावल्या, उजवीकडे डावीकडे वांकून वांकून अल्लाहतआलाच्या समोर सजदा करीत आहेत; आणि विनय प्रदर्शित आहे. [५] (४८)**

१) 'अहलुजिक्र' ने अभिप्रेत ग्रंथधारी लोक आहे; जे मागील पैगंबर आणि त्यांच्या इतिहासाला जाणीत होते. अर्थ हा की, आम्ही जेवढेपण पैगंबर पाठविले, ते मनुष्यच होते. म्हणून मोहम्मद रसूलुल्लाह ﷺ पण जर मनुष्य आहेत, तर ही काही नवी गोष्ट नाही, की त्यांच्या मनुष्य होण्यामुळे,त्यांच्या पैगंबरीला नाकारावे. जर तुम्हाला शंका आहे, तर ग्रंथधारी लोकांना विचारून घ्या; की मागील पैगंबर मानव होते की, देवदूत? जर ते देवदूत होते, तर तुम्ही अवश्य नाकारून टाका. जर ते सर्व, मनुष्य होते, तर मग मोहम्मद रसूलुल्लाह ﷺ च्या पैगंबरीला, केवळ मनुष्य आहे म्हणून, नकार का?

२) याचे कित्येक भावार्थ होऊ शकतात. उद्धाहरणार्थ (अ) जेव्हा तुम्ही व्यापार आणि कारभारासाठी प्रवासावर जाल, (ब) जेव्हा तुम्ही कारभाराला उर्जितावस्था येण्यासाठी, मेहनत, प्रयत्न आणि काही पद्धती अंगिकाराल, (क) किंवा रात्री आराम करण्यासाठी, आपल्या बिछान्यात जाल, हे 'तकल्लुब' चे निरनिराळे भावार्थ आहेत. अल्लाह जेव्हा इच्छील, तेव्हा तुमची या स्वरूपात पण पकड करू शकतो.

३) 'तखव्वूफ' चा हा अर्थ पण होऊ शकतो की, पहिल्यापासूनच मनांत शिक्षा आणि पकडीचे भय असावे. जसे काही वेळा, मनुष्य मोठा गुनाह करून बसतो, तर त्याला भीती वाटते की कोठे अल्लाह माझी पकड न करो! म्हणून काही वेळा अशाप्रकारे पण पकड होते.

४) की तो गुन्ह्यांवर लगेच पकड करीत नाही; किंबहुना सवलत देतो. आणि या सवलतीने पुष्कळशा लोकांना पश्चात्ताप व्यक्त करण्याची, आणि माफी मागण्याची, सुबुद्धी प्राप्त होऊन जाते.

५) अल्लाहतआलाची महत्ता व मोठेपण, आणि त्यांची जाज्वल्य शानचे वर्णन आहे की, प्रत्येक वस्तू त्याच्यासमोर वाकलेली आणि त्याच्या आज्ञांकीत आहे. निर्जिव वस्तू असोत किंवा सजीव, किंवा जिन्न मनुष्ये आणि देवदूत, प्रत्येक ती वस्तू जिची सावली आहे, आणि जिचे टोक उजवीकडे, डावीकडे झुकत असते; तर ती आपल्या सांवलीसह, सकाळ संध्याकाळ, अल्लाहला सजदा करीत असते. इमाम मुजाहिद म्हणतात, जेव्हा सूर्य ढळतो, तेव्हा प्रत्येक वस्तू अल्लाहच्या समोर सजद्यात पडून जाते.

وَلِلّٰهِ يَسْجُدُ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ مِنْ دَآبَّةٍ وَّالْمَلٰٓئِكَةُ وَهُمْ لَا يَسْتَكْبِرُوْنَ ﴿٤٩﴾

**आणि खचित्च आकाश आणि पृथ्वीचे सर्व सजीव, आणि तमाम देवदूत, अल्लाहतआला समोर सजदा करतात; आणि जरा पण अहंकार करीत नाही ४९**

يَخَافُوْنَ رَبَّهُمْ مِّنْ فَوْقِهِمْ وَيَفْعَلُوْنَ مَا يُؤْمَرُوْنَ ﴿٥٠﴾ السجدة

**आपल्या पालनकर्त्यासमोर जो त्यांच्यावर आहे, थरथर कांपत असतात;[1] आणि जो हुकूम मिळून जाईल, त्याच्या अंमलबजावणीत लागून राहतात[2] ५०**

وَقَالَ اللّٰهُ لَا تَتَّخِذُوْٓا اِلٰهَيْنِ اثْنَيْنِ ۚ اِنَّمَا هُوَ اِلٰهٌ وَّاحِدٌ ۚ فَاِيَّايَ فَارْهَبُوْنِ ﴿٥١﴾

**आणि अल्लाहतआलाने सांगून टाकले आहे की, दोन उपास्य बनवू नका; उपास्य तर फक्त तो एकटा[3] (च) आहे; मग तुम्ही सर्व माझीच भीती बाळगा ५१**

وَلَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَلَهُ الدِّيْنُ وَاصِبًا ۭ اَفَغَيْرَ اللّٰهِ تَتَّقُوْنَ ﴿٥٢﴾

**आणि आकाशांमध्ये आणि पृथ्वीत, जे काही आहे, ते सर्व त्याचेच आहे; आणि त्याचीच उपासना आवश्यक[4] आहे. काय तरी सुद्धा तुम्ही, त्याच्याशिवाय दुसऱ्यांना भितात ? ५२**

وَمَا بِكُمْ مِّنْ نِّعْمَةٍ فَمِنَ اللّٰهِ ثُمَّ اِذَا مَسَّكُمُ الضُّرُّ فَاِلَيْهِ تَجْـَٔـرُوْنَ ﴿٥٣﴾

**आणि तुमच्याजवळ जेवढ्यापण देणग्या आहेत, सर्व त्याच्याच दिलेल्या आहेत.[5] आता सुद्धा जेव्हा कधी, तुम्हावर कोणी संकट येऊन पडेल. तर तुम्ही त्याच्याच पुढे रडारड करतात.[6] ५३**

ثُمَّ اِذَا كَشَفَ الضُّرَّ عَنْكُمْ اِذَا فَرِيْقٌ مِّنْكُمْ بِرَبِّهِمْ يُشْرِكُوْنَ ﴿٥٤﴾

**मग जेव्हा त्याने तुमच्यावरून ते संकट टाळून टाकले, तर तुमच्यातून काही लोक, आपल्या पालनकर्त्याबरोबर शिर्क करू लागतात; ५४**

لِيَكْفُرُوْا بِمَآ اٰتَيْنٰهُمْ ۭ فَتَمَتَّعُوْا ۣ فَسَوْفَ تَعْلَمُوْنَ ﴿٥٥﴾

**की आमच्या दिलेल्या देगण्यांच्या प्रति, कृतघ्नता करावी.[7] तर बरे! काही फायदा उचलून घ्या, सरशेवटी तुम्हास ठाऊक होऊनच जाईल[8] ५५**

१) अल्लाहच्या भीतीमुळे थरथर कांपत असतात.

२) अल्लाहच्या आज्ञेकडून तोंड फिरवत नाही. परंतु ज्याची आज्ञा दिली जाते, ती पाळतात. ज्यापासून मना करण्यांत येते, त्यापासून थांबून जातात.

३) कारण की, अल्लाहच्या शिवाय कोणी उपास्य नाही. जर आकाशांत आणि पृथ्वीत दोन उपास्य असते, तर या विश्वाची व्यवस्था कायम राहू शकली नसती; हे फिसाद आणि बिघाडाला बळी पडले असते. ''जर आकाश आणि पृथ्वीत अल्लाहच्या शिवाय, आणखी ही उपास्य असते, हे दोन्ही गडबडून गेले असते.'' (सू. अंबिया-२२) म्हणून 'सनवीय्यत्' (दोन अल्लाहची श्रद्धा) ज्याला अग्नीपुजक मानीत आले आहेत, किंवा 'तअद्दुदि इलाह' (पुष्कळशा उपास्यांची श्रद्धा) ज्याला बहुतेक मुशरिकीन मानत आले आहेत; हे सर्व निरर्थक आहे. जेव्हा ब्रम्हांडाचा निर्माता एक आहे; आणि तोच कोणाचीही भागीदारी केल्याशिवाय, संपूर्ण ब्रम्हांडाचे व्यवस्थापन आणि बंदोबस्त चालवीत आहे, तर उपास्य पण फक्त तोच आहे, जो एकटा आहे. तो दोन किंवा दोनपेक्षा जास्त नाही.

४) त्याचीच उपासना आणि आज्ञापालन कायमस्वरूपी आणि आवश्यक आहे. 'वासिब' चा अर्थ कायमस्वरूपाचा (नित्याचा) आहे. 'वलहुम अजाबुव् वासिब' (सू. साफ्फात-९) 'त्यांच्यासाठी नित्याची शिक्षा आहे.' आणि याचा तोच अर्थ आहे जो दुसऱ्या ठिकाणावर वर्णन करण्यात आला आहे. ''मग फक्त अल्लाहची उपासना करा; त्याच्याच करता, उपासनेला निव्वळ करून; खबरदार! त्याच्याच करता निव्वळ भक्ती आहे.'' (सू. जुमर - २/३)

५) जेव्हा सर्व देणग्यांचा देणारा फक्त एक अल्लाह आहे, तर मग उपासना आणखी कोणाची का?

६) याचा अर्थ आहे की, अल्लाहच्या एक होण्याची श्रद्धा, अंत:करणात आणि समजण्याच्या सामर्थ्यांत, भिनली आहे; ती त्यावेळी उसळून पुढे येते, जेव्हा सर्व बाजूंनी नैराश्य येऊन घेरते.

७) परंतु मनुष्य पण किती कृतघ्न आहे की, त्रास (आजारपण, तंगी आणि नुकसान वगैरे) चे दूर होताच, तो मग पालनकर्त्याबरोबर शिर्क करू लागतो.अथवा अकडतो व गर्व करु लागतो. (सू.हूद-१०) अथवा म्हणतो, ''हा तर माझ्या ज्ञान व कलेचा परिणाम आहे.'' (सू.जूमर-४९). अथवा म्हणतो मी तर देणग्यांलाच पात्र (हक्कदार) होतो. (सू.हा मीम सजदा ५०)

८) हे अशाचप्रकारे आहे, जसे याच्यापूर्वी सांगितले, ''काही दिवसांच्या जीवनात, फायदा उचलून घ्या; सरशेवटी तुमचे ठिकाण नरकाग्नी आहे.'' (सू. इब्राहीम - ३०)

وَيَجْعَلُوْنَ لِمَا لَا يَعْلَمُوْنَ نَصِيْبًا مِّمَّا رَزَقْنٰهُمْ ۗ تَاللّٰهِ لَتُسْـَٔلُنَّ عَمَّا كُنْتُمْ تَفْتَرُوْنَ ﴿٥٦﴾

आणि ज्यांना ओळखत पण नाही, त्यांचा वाटा, आमच्या दिलेल्या वस्तुंत निश्चित करतात.[१] अल्लाहची शपथ! तुमच्या या कुभांडाची विचारणा तुम्हास अवश्य केली जाईल[२] ५६

وَيَجْعَلُوْنَ لِلّٰهِ الْبَنٰتِ سُبْحٰنَهٗ ۙ وَلَهُمْ مَّا يَشْتَهُوْنَ ﴿٥٧﴾

आणि ते, अल्लाह जो पवित्र आहे, त्याच्याकरीता मुली ठरवितात. आणि आपल्यासाठी ते, जे आपल्या मर्जीनुसार असेल[३] ५७

وَاِذَا بُشِّرَ اَحَدُهُمْ بِالْاُنْثٰى ظَلَّ وَجْهُهٗ مُسْوَدًّا وَّهُوَ كَظِيْمٌ ﴿٥٨﴾

आणि यांच्यातून कोणाला जर मुलगी झाल्याची बातमी दिली जाईल, तर त्याचा चेहरा काळा ठिक्कर पडून जातो. आणि (तो) मनांतल्या मनांत झुरणीला लागतो ५८

يَتَوَارٰى مِنَ الْقَوْمِ مِنْ سُوْٓءِ مَا بُشِّرَ بِهٖ ۗ اَيُمْسِكُهٗ عَلٰى هُوْنٍ اَمْ يَدُسُّهٗ فِى التُّرَابِ ۗ اَلَا سَآءَ مَا يَحْكُمُوْنَ ﴿٥٩﴾

या वाईट बातमीमुळे, लोकांपासून लपून छपून फिरतो. (तो) विचार करतो की, काय या अपमानाला तसेच ठेवावे की, त्याला मातीत दाबून टाकावे? पहा तर! (हे लोक) किती वाईट निर्णय करतात?[४] ५९

لِلَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ بِالْاٰخِرَةِ مَثَلُ السَّوْءِ ۚ وَلِلّٰهِ الْمَثَلُ الْاَعْلٰى ۗ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٦٠﴾

परलोकावर विश्वास न ठेवण्याची वाईट उपमा आहे.[५] आणि अल्लाहसाठी तर उंचच उंच अशा उपमा आहेत; आणि तोच परमसमर्थ आणि बुद्धीमान आहे.[६] ६०

وَلَوْ يُؤَاخِذُ اللّٰهُ النَّاسَ بِظُلْمِهِمْ مَّا تَرَكَ عَلَيْهَا مِنْ دَآبَّةٍ وَّلٰكِنْ يُّؤَخِّرُهُمْ اِلٰٓى اَجَلٍ مُّسَمًّى ۚ فَاِذَا جَآءَ اَجَلُهُمْ لَا يَسْتَاْخِرُوْنَ سَاعَةً وَّلَا يَسْتَقْدِمُوْنَ ﴿٦١﴾

आणि जर लोकांच्या अपराधांवर, अल्लाह त्यांची पकड करीता, तर जमिनीच्या पृष्ठभागावर एकपण जीवधारी बाकी राहिला नसता.[७] तो तर त्यांना एका वेळेपर्यंत ढिल देत आहे.[८] जेव्हा त्यांचा वेळ येऊन ठेपतो; तर ते एक क्षण सुद्धा, मागे राहू शकत नाही, आणि पुढेही जाऊ शकत नाही ६१

وَيَجْعَلُوْنَ لِلّٰهِ مَا يَكْرَهُوْنَ وَتَصِفُ اَلْسِنَتُهُمُ الْكَذِبَ اَنَّ لَهُمُ الْحُسْنٰى ۗ لَا جَرَمَ اَنَّ لَهُمُ النَّارَ وَاَنَّهُمْ مُّفْرَطُوْنَ ﴿٦٢﴾

आणि ते आपल्या करीता जे नापसंत करतात, त्याची अल्लाहसाठी योजना करतात;[९] आणि ते आपल्या जिव्हांनी, खोट्या गोष्टी सांगतात की, त्यांच्यासाठी कल्याण (च)[१०] आहे. नाही! नाही! खरे पाहता त्यांच्याकरता, आग आहे, आणि हे नरकाग्नीत जाणाऱ्यांचे पुढारी[११] आहेत ६२

تَاللّٰهِ لَقَدْ اَرْسَلْنَآ اِلٰٓى اُمَمٍ مِّنْ قَبْلِكَ فَزَيَّنَ لَهُمُ الشَّيْطٰنُ اَعْمَالَهُمْ فَهُوَ وَلِيُّهُمُ الْيَوْمَ وَلَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٦٣﴾

अल्लाहची शपथ! आम्ही तुझ्या पूर्वीच्या जनसमूहाकडे सुद्धा, आपले पैगंबर पाठविले; परंतु शैतानाने त्यांची वाईट कर्मे, त्यांच्या नजरेत, सुशोभित करून दाखविली;[१२] तो शैतान आजपण त्यांचा मित्र बनून राहिला आहे;[१३] आणि त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा आहे. ६३

१) म्हणजे ज्यांना ते, इच्छापूर्ती करणारे, संकट निवारक आणि उपास्य, समजतात, त्या दगडाच्या मुर्त्या आहेत. किंवा जिन्नात व शैतान आहेत; ज्यांच्या वास्तविकतेचे त्यांना ज्ञानच नाही. अशाचप्रकारे कबरीत दफन झालेल्या लोकांची, हकीकत पण कोणी जाणत नाही; की त्यांच्याबरोबर तेथे काय मामला होत आहे? ते अल्लाहच्या आवडत्या व्यक्तींमधून आहेत, किंवा कोण्या दुसऱ्या यादीत आहेत? आणि काय अल्लाह तआलाने या मृत पावलेल्यांना काही अधिकारपण देऊन ठेवले आहेत? या गोष्टींना कोणी जाणत नाही. परंतु या जुलूमी लोकांनी त्यांच्या हकीकतशी अजाण असून सुद्धा, त्यांना अल्लाहचा सरकतदार ठरवून ठेवले आहे. आणि अल्लाहच्या दिलेल्या संपत्तीतून त्यांच्या करता सुद्धा (नवस म्हणून) वांटा निश्चित करतात. किंबहुना अल्लाहचा वाटा जर राहून जाईल, तर राहून जावो? त्यांच्या वाट्यांना कमी करीत नाही; जसे की, सू.अन्आम - १३६ मध्ये वर्णन केले गेले आहे.

२) तुम्ही अल्लाहवर जे कुभांड रचतात की, त्याचा भागीदार, किंवा त्याचे भागीदार आहेत, याच्या बाबतीत कयामतच्या दिवशी तुम्हांस विचारणा होईल.

३) अरबांची काही घराणी (खुजाआ आणि किनाना) देवदूतांची भक्ती करत असत; आणि म्हणत की, ह्या अल्लाहच्या

मुली आहेत. म्हणजे एक जुलूम तर हा केला की, अल्लाहची संतती ठरविली; जेव्हा की त्याची कोणी संतती नाही; मग संतती पण स्त्रीलिंगी जिला ते आपल्या करता पसंतच करीत नसत, तिला अल्लाहसाठी पसंत केले, जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''काय तुमच्या करता मुलगे, आणि त्याच्या करता मुली? ही तर फार विचित्र वांटणी आहे.'' (सू. नज्म २१/२२) येथे फर्माविले की तुम्ही ही इच्छा बाळगतात की, मुलगे व्हावेत, आणि मुलगी कोणी नसावी.

४) म्हणजे मुलीच्या जन्माची बातमी ऐकून, त्यांची तर ही स्थिती होते, जी वर उल्लेख केली. आणि अल्लाहसाठी मुली ठरविता. किती वाईट फैसला ते करतात? येथे हे न समजले जावे की, अल्लाहतआलापण मुलांच्या तुलनेत मुलीला क्षुल्लक आणि कनिष्ठ समजतो. नाही! अल्लाहच्या जवळ मुलगे, मुली मध्ये काही भेदभाव नाही. न लिंगभेदावर, तिटकारा किंवा उच्चता, यांची कल्पना त्याच्या जवळ आहे. येथे फक्त अरबांची अन्यायवृत्ती, आणि एकदम अयोग्य चाल, यांना स्पष्ट करण्याचा उद्देश्य आहे. जी त्यांनी अल्लाहसाठी अंगिकारली होती. वास्तविक पाहता अल्लाहच्या श्रेष्ठत्वाचे आणि मोठेपणाला ते मानीत होते. त्याचा वैचारीक परिणाम तर हा होता की, जी वस्तू आपल्यासाठी पसंत करीत नसत, तर त्यांनी अल्लाहसाठी पण तिला पसंत करावयास नको होते; परंतु त्यांनी याच्या उलट केले; येथे फक्त याच अन्यायाचा खुलासा करण्यात आला आहे.

५) म्हणजे काफिरांच्या ज्या मर्यादेबाहेर गेलेल्या वाईट गोष्टी, वर्णन केल्या गेल्या आहेत, त्यांच्याचसाठी वाईट उदाहरण किंवा वैशिष्ट्य आहे; म्हणजे अज्ञान आणि कुफ्रचे वैशिष्टय; किंवा हा अर्थ आहे की,अल्लाहची जी पत्नी आणि संतती ते ठरवितात; ही वाईट उपमा आहे, जी हे परलोकाला नाकारणारे अल्लाहसाठी वर्णन करतात.

६) म्हणजे त्याचे प्रत्येक वैशिष्ट्य. त्याच्या निर्मितीपेक्षा, उच्च श्रेष्ठ आहे. उदाहरणार्थ त्याचे ज्ञान (फारच) विस्तृत आहे. त्याचे सामर्थ्य अमर्यादच आहे. त्याच्या औदार्यचे कोणी उदाहरण नाही  किंवा हा अर्थ आहे की, तो सर्व समर्थ आहे, निर्माता आहे. रोजी देणारा, आणि पाहणारा आणि ऐकणारा आहे, वगैरे (फत्हुल कदीर) किंवा वाईट उपमेचा अर्थ, कसर, कोताई आहे; आणि उच्च उपमेचा अर्थ आहे, कमाल दर्जाचा स्वतंत्र, प्रत्येक दृष्टीकोनातून अल्लाहच आहे. (इब्ने कसीर)

७) ही त्याची कनवाळूवृत्ती आहे. आणि त्याच्या बुद्धी आणि प्रयोजनाची मागणी आहे की, तो आपला आज्ञाभंग पहातो, तरी सुद्धा तो आपल्या देणग्या मागे घेतो, न ताबडतोब पकड करितो. वास्तविक जर गुन्हा करताच क्षणी, तो पकड करणे सुरू करून देईल, तर जुलुम व अपराध, आणि कुफ्र व शिर्क इतके सर्वसाधारण आहे की, जमिनीच्या पृष्ठभागावर, कोणी जीवधारी बाकी राहणार नाही. कारण की जेव्हा वाईट गोष्टी सर्व साधारण होऊन जाता; तेव्हा मग सार्वत्रिक शिक्षेत, सदाचरणी लोकपण, गारद करून टाकण्यात येतात. तथापि परलोकांत ते अल्लाहजवळ यशस्वी राहतील; जसे की हदीसमध्ये स्पष्टीकरण येते. (कृपया पहावे, स.बुखारी, क्र.२११८ व स. मुस्लिम क्र.२२०६ व २२१०)

८) हे त्या प्रयोजनाचे वर्णन आहे, ज्याच्या अंतर्गत, तो एका विशिष्ट वेळेपर्यंत, सवलत देतो. कारण की, एक तर त्यांच्यासाठी काही सबब बाकी राहू नये; दुसरे त्यांच्या संततीमधून काही ईमानदार निघून यावेत.

९) म्हणजे मुली (कन्या) ही पुनरावृत्ती ताकीद करण्यासाठी आहे.

१०) हे त्यांच्या दुसऱ्या वाईट गोष्टीचे वर्णन आहे; की ते अल्लाहच्या बरोबर अन्यायाचा मामला करतात. परंतु त्यांच्या जिव्हा ज्या खोटे बोलतात, की त्यांचा परिणाम चांगला आहे, त्यांच्यासाठी भलेपण आहे. आणि या जगाप्रमाणे, त्यांचे परलोकपण चांगले असेल; वास्तविक असे नाही; आणि शक्यही नाही.

११) म्हणजे खचित्च त्यांचा परिणाम ''चांगला आहे; आणि तो आहे नरकाग्नीची आग. त्यांच्यात ते नर्कवासियांचे पुढारी, म्हणजे प्रथम जाणारे असतील. 'फरत' चा पण हाच अर्थ हदीसने सिद्ध आहे. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''मी हौजे कौसरवर तुमचा सर्वांतपुढे जाणारा असेल.'' (स.बुखारी क्र.६५८४ व मुस्लिम क्र.१७९३) एक दुसरा अर्थ 'मुफ्रतून' चा हा केला गेला आहे की, त्यांना नरकाग्नीत टाकून, विसरून जाण्यात येईल.

१२) ज्यामुळे त्यांनी सुद्धा पैगंबरांना खोटे ठरविले; ज्याप्रमाणे हे पैगंबर! मक्केचे कुरैश तुला खोटे ठरवित आहे. म्हणजे हे पण शैतानाचे कारस्थान आहे.

१३) 'अलयौम' ने एकतर जगातील काळ, अभिप्रेत आहे. जसे की भाषांतराने स्पष्ट आहे. किंवा याच्याने अभिप्रेत परलोक आहे की, तेथे सुद्धा हा त्यांचा साथीदार राहील. किंवा 'वलीय्युहुम्' मध्ये 'हुम' चा मर्जा, मक्केचे काफिर आहेत; म्हणजे हाच शैतान ज्याने मागच्या जनसमूहांना मार्गभ्रष्ट केले, आज तो या मक्केच्या कुरैशांचा दोस्त आहे;आणि त्यांना पैगंबरीला खोटे ठरविण्यांकरता भाग पाडत आहे.

وَمَآ اَنۡزَلۡنَا عَلَيۡكَ الۡكِتٰبَ اِلَّا لِتُبَيِّنَ لَهُمُ الَّذِى
اخۡتَلَفُوۡا فِيۡهِ‌ۙ وَهُدًى وَّرَحۡمَةً لِّقَوۡمٍ يُّؤۡمِنُوۡنَ ﴿٦٤﴾

आणि या पुस्तकाला आम्ही, तुमच्यावर यासाठी उतारले आहे की, आपण प्रत्येक त्या गोष्टीला स्पष्ट करून टाकावे, ज्यात हे मतभेद करीत आहेत. [१] आणि हे ईमानवाल्यांसाठी मार्गदर्शन आणि रहमत आहे. ६४

وَاللّٰهُ اَنۡزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً فَاَحۡيَا بِهِ الۡاَرۡضَ
بَعۡدَ مَوۡتِهَا‌ ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيَةً لِّقَوۡمٍ
يَّسۡمَعُوۡنَ ﴿٦٥﴾ ع ٨ ١٤

आणि अल्लाह आकाशातून पाणी वर्षवून, जमिनीला तिच्या मृत झाल्या पश्चात, जिवंत करून टाकतो. खचित्‌च याच्यांत त्या लोकांसाठी, निशाणी आहे, जे ऐकतात ६५

وَاِنَّ لَـكُمۡ فِى الۡاَنۡعَامِ لَعِبۡرَةً‌ ؕ نُسۡقِيۡكُمۡ مِّمَّا
فِىۡ بُطُوۡنِهٖ مِنۡۢ بَيۡنِ فَرۡثٍ وَّدَمٍ لَّبَنًا خَالِصًا
سَآئِغًا لِّلشّٰرِبِيۡنَ ﴿٦٦﴾

आणि तुमच्यासाठी तर चतुष्पादांमध्ये [२] सुद्धा, मोठा बोध आहे की, आम्ही त्याच्या पोटातूंन जे काही आहे, त्याच्यातून शेण आणि रक्ताच्या मधून शुद्ध दूध (तुम्हाला) पाजतो; जे पिणाऱ्यांसाठी सहज पचणारे आहे [३] ६६

وَمِنۡ ثَمَرٰتِ النَّخِيۡلِ وَالۡاَعۡنَابِ تَتَّخِذُوۡنَ مِنۡهُ
سَكَرًا وَّرِزۡقًا حَسَنًا‌ ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيَةً لِّقَوۡمٍ
يَّعۡقِلُوۡنَ ﴿٦٧﴾

आणि खजुर आणि द्राक्षाच्या वृक्षापासून तुम्ही मद्य बनवून घेता. [४] आणि उत्तम आहारपण. जे लोक बुद्धी बाळगतात, त्यांच्यासाठी तर, याच्यात फार मोठी निशाणी आहे ६७

وَاَوۡحٰى رَبُّكَ اِلَى النَّحۡلِ اَنِ اتَّخِذِىۡ مِنَ
الۡجِبَالِ بُيُوۡتًا وَّمِنَ الشَّجَرِ وَمِمَّا يَعۡرِشُوۡنَ ۙ‏ ﴿٦٨﴾

आणि तुमच्या पालनकर्त्याने मधमाशीच्या मनात ही गोष्ट टाकून [५] दिली की, पर्वतांत, वृक्षांवर, आणि लोकांनी बनविलेल्या उंच इमारतींमध्ये, आपले पोळे बनीव ६८

ثُمَّ كُلِىۡ مِنۡ كُلِّ الثَّمَرٰتِ فَاسۡلُكِىۡ سُبُلَ
رَبِّكِ ذُلُلًا‌ ؕ يَخۡرُجُ مِنۡۢ بُطُوۡنِهَا شَرَابٌ مُّخۡتَلِفٌ
اَلۡوَانُهٗ فِيۡهِ شِفَآءٌ لِّلنَّاسِ‌ ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيَةً
لِّقَوۡمٍ يَّتَفَكَّرُوۡنَ ﴿٦٩﴾

मग प्रत्येक प्रकारचे मेवे खा, आणि आपल्या पालनकर्त्याच्या सोप्या मार्गांवर चालत फिरत रहा; त्यांच्या पोटांतून पिण्याचे मध निघते; [६] ज्याचे रंग निरनिराळे आहेत [७] आणि ज्यांच्यात लोकांच्या (आजाराचा) परिहार आहे. [८] खचित्‌च चिंतन आणि मनन करणाऱ्यांसाठी याच्यांत सुद्धा मोठी निशाणी आहे. ६९

وَاللّٰهُ خَلَقَكُمۡ ثُمَّ يَتَوَفّٰٮكُمۡ‌ ۙ وَمِنۡكُمۡ مَّنۡ يُّرَدُّ
اِلٰۤى اَرۡذَلِ الۡعُمُرِ لِكَىۡ لَا يَعۡلَمَ بَعۡدَ عِلۡمٍ شَيۡـــًٔا‌ ؕ
اِنَّ اللّٰهَ عَلِيۡمٌ قَدِيۡرٌ ﴿٧٠﴾ ع ٩ ١٥

आणि अल्लाहतआलाने तुम्हा सर्वांस निर्माण केले आहे; मग तोच तुम्हास मृत्यू देईल; तुमच्यात असे पण आहेत, जे खडतर आयुष्याकडे पालटले जातात; की, फार काही जाणल्या बुजल्यानंतर, पण त्यांना काही जाणता येऊ नये; [९] नि:संशय अल्लाह जाणता आणि समर्थ आहे. ७०

وَاللّٰهُ فَضَّلَ بَعۡضَكُمۡ عَلٰى بَعۡضٍ فِى الرِّزۡقِ‌ ۚ
فَمَا الَّذِيۡنَ فُضِّلُوۡا بِرَآدِّىۡ رِزۡقِهِمۡ عَلٰى مَا
مَلَـكَتۡ اَيۡمَانُهُمۡ فَهُمۡ فِيۡهِ سَوَآءٌ‌ ؕ اَفَبِنِعۡمَةِ اللّٰهِ
يَجۡحَدُوۡنَ ﴿٧١﴾

आणि अल्लाहतआलानेच, तुमच्यातून कित्येकांस, कित्येकांवर, अन्न, संपत्तीत श्रेष्ठत्व दिले आहे; मग ज्यांना श्रेष्ठत्व दिले गेले आहे; ते आपली रोजी, आपल्या आधीन असलेल्या सेवकांना देत नाही; की ते आणि हे समान होऊन जातील; [१०] तर काय हे लोक अल्लाहच्या देणग्यांप्रति कृतघ्न होत आहेत [११]? ७१

وَاللّٰهُ جَعَلَ لَـكُمۡ مِّنۡ اَنۡفُسِكُمۡ اَزۡوَاجًا وَّجَعَلَ
لَـكُمۡ مِّنۡ اَزۡوَاجِكُمۡ بَنِيۡنَ وَحَفَدَةً وَّرَزَقَكُمۡ
مِّنَ الطَّيِّبٰتِ‌ ؕ اَفَبِالۡبَاطِلِ يُؤۡمِنُوۡنَ وَبِنِعۡمَتِ
اللّٰهِ هُمۡ يَكۡفُرُوۡنَ ۙ‏ ﴿٧٢﴾

आणि अल्लाहतआलाने तुमच्या करीता, तुमच्यातूनच तुमच्या पत्न्या निर्माण केल्या; आणि तुमच्या पत्नीपासून, तुमच्या करिता, पुत्र आणि नातू निर्माण केले; आणि शुद्ध आणि चोख्या वस्तू खावयांस दिल्यात. तर काय तरीसुद्धा लोक असत्यावर ईमान आणतील? [१२] आणि अल्लाहच्या देणग्यांच्या प्रति कृतघ्नता करतील? ७२

१) याच्यांत नबी ﷺ चे आपले स्थान वर्णन केले गेले आहे की, श्रद्धा आणि धर्मशास्त्राचे आदेश, यांच्या संदर्भात यहूदी आणि ख्रिस्त्यांच्या दर्म्यान, आणि अशाच प्रकारे, अग्नीपुजक आणि मुशरिकीनच्या दर्म्यान, आणि दुसऱ्या धर्मावाल्यांच्या दर्म्यान जे आपसांत मतभेद आहेत, त्याचे अशाप्रकारे स्पष्टीकरण करा, की, सत्य आणि असत्य

स्पष्ट होऊन नावे; कारण की लोकांनी सत्याला अंगिकारावे आणि असत्यापासून स्वत:ला वांचवावे.
२) 'अन्आम' (चतुष्पाद) ने उंट, गाय, बकरी (व मेंढी आणि दुम्बा) अभिप्रेत होतात.
३) हे चतुष्पाद (प्राणी) जे काही खातात, त्यांच्या जठरांत जाते. याच आहारातून दूध, रक्त शेण आणि मुत्र बनते. रक्त वाहिन्यांत, आणि दूध स्तनांत, अशाच प्रकारे शेण आणि मुत्र, आपआपल्या बरोबर टाकण्याच्या जागी विभागले जाते. आणि दुधांत न रक्ताचा रंग, शामील होतो, न शेण मुत्राचा घाणेरडा वास. शुभ्र आणि स्वच्छ दूध बाहेर येते; जे सहजरित्या घशाखाली उतरून जाते.
४) हे महावाक्य त्यावेळी अवतरीत झाले होते, जेव्हा दारू (मद्य) हराम झाली नव्हती. म्हणून हलाल वस्तुंबरोबर इचापण उल्लेख केला गेला आहे.
५) 'वह्य' ने अभिप्रेत, अल्लाहकडून मनांत टाकलेली गोष्ट, आणि ती जाण आहे, जी अल्लाहतआलाने आपल्या शारीरिक गरजा पूर्ण करण्यासाठी, प्राण्यांना पण प्रदान केली आहे.
६) मधमाशी प्रथम पर्वतांत, आणि वृक्षांवर आणि इमारतींच्या उंचीवर, आपली षटकोनी घरे आणि पोळे अशाप्रकारे बनवते की, दर्म्यानमध्ये काही, छिद्रे (भोक) रहात नाही. मग ती बागा, जंगले, दऱ्या आणि पर्वतांत फिरत राहते; आणि कित्येक प्रकारच्या फुलांचा रस आपल्या पोटांत जमा करते; आणि मग त्याच मार्गांनी, जेथून जेथून ती जाते, परत फिरते. आणि आपल्या पोळ्यावर येऊन बसून जाते. जेथे तिच्या तोंडातून किंवा पोटांतून, मध निघते, ज्याला कुरआनाने 'मद्य' म्हटले आहे, म्हणजे आपल्या मनाला ताजगी देणारे शरबत.
७) कोणी लाल, कोणी शुभ्र, कोणी निळे, कोणी जर्द पिवळ्या रंगाचे. ज्या प्रकारच्या फळे आणि शेतीपासून ती खाद्य गोळा करते, त्याच हिशेबाने त्याचा रंग आणि चव पण वेगवेगळी असते.
८) 'शिफाउन' मध्ये तनकीर, ताजीम करता आहे. म्हणजे पुष्कळशा रोगांसाठी मध परिहार आहे. असे नाही की, सरसकट सर्व आजारांसाठी इलाज आहे. वैद्यकांतील जाणकारांनी सुद्धा, स्पष्ट केले आहे की, मध खचित्च एक आरोग्यदायी नैसर्गिक पेय आहे; परंतु विशिष्ट आजारांसाठी, न की प्रत्येक आजारासाठी.
हदीसमध्ये येते की, नबी ﷺ ला हलवा (गोड वस्तू) आणि मध प्रिय होते. (स.बुखारी) एका दुसऱ्या रिवायतीत आहे की, आपण ﷺ नी फर्माविले, ''तीन गोष्टींत परिहार (उपाय) आहे. शेमड्या लावण्यात, मध पिण्यात, आणि अग्नीने डांगण्यांत. परंतु मी माझ्या उम्मतला डाग देण्यापासून मना करतो.'' (स. बुखारी) हदीसमध्ये एक घटना पण येते, जुलाब होण्याच्या आजारात, आपण ﷺ नी मध वापरण्याचा सल्ला दिला; ज्यामुळे, जुलाबांत वाढ झाली; येऊन सांगण्यांत आले; तर दुसऱ्यांदा आपण ﷺ नी, मध पाण्याचा सल्ला दिला; ज्यामुळे आणखी जुलाब बाहेर पडले; आणि घरवाले असे समजले की, कदाचित् आजारात वाढ झाली आहे. पुन्हा नबी ﷺ च्या जवळ आले; आपण तिसऱ्यांदा फर्माविले, ''अल्लाह खरा आहे, आणि तुझ्या भावाचे पोट लबाड आहे जा! आणि त्याला मध पाजा. म्हणून त्याला तिसऱ्या वेळी, त्याला पूर्ण आराम पडला. (स. बुखारी स. मुस्लिम)
९) जेव्हा मनुष्य सर्व साधारण वयाला पार करून जातो, तर तेव्हा त्याची स्मरणशक्ती पण कमी होऊन जाते. आणि कित्येक वेळा बुद्धी पण मंद होऊन, लहान मुलासारखी होऊन जाते. हे काहीच कामांत न येणारे वय (नाकारा उम्र) आहे; ज्याच्यापासून नबी ﷺ नी पण अल्लाहचा आश्रय मागितलेला आहे.
१०) म्हणजे जेव्हा तुम्ही आपल्य दासांना एवढी ऐहिक संपत्ती आणि सामान देत नाही की, ते तुमच्याबरोबर होऊन जातील; तर अल्लाहतआला केव्हा हे पसंत करील, की तुम्ही काही लोकांना जे अल्लाहचे बंदे आणि गुलाम आहे, अल्लाहचा सरकतदार, आणि त्याचे समान ठरवून टाकावे. या महावाक्याने हे पण माहित झाले की, आर्थिक दृष्ट्या माणसांत जो भेद आढळतो तो अल्लाहतआलाने बनवलेल्या नैसर्गिक व्यवस्थे प्रमाणे आहे. याला हुकूमशाहीने व जबरी कायद्याने संपुष्टात आणले जाऊ शकत नाही. जसे की कम्युनिष्ट, मार्क्ससिस्ट व्यवस्थेत आहे. म्हणजे आर्थिक समानतेच्या अनैसर्गिक प्रयत्ना ऐवजी प्रत्येकास आर्थिक क्षेत्रात दैनंदिन हलाल रोजी कमाविण्यासाठी समान अवसर मिळाला पाहिजे.
११) की अल्लाहच्या दिलेल्या संपत्तीतून, अल्लाहच्या शिवाय दुसऱ्यांसाठी नवस म्हणून काढतात, आणि अशाप्रकारे देणग्यांप्रति कृतघ्नता दाखवितात.
१२) म्हणजे अल्लाहतआला, आपल्या या बक्षीसांचा उल्लेख करून, ज्यांचा या महावाक्यांत उल्लेख आहे, प्रश्न विचारीत आहे की, सर्व काही देणारा तर अल्लाह आहे. परंतु हे त्याला सोडून दुसऱ्यांची उपासना करतात; आणि दुसऱ्यांचेच म्हणणे मानतात.

وَيَعْبُدُونَ مِن دُونِ اللَّهِ مَا لَا يَمْلِكُ لَهُمْ رِزْقًا
مِّنَ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ شَيْئًا وَلَا يَسْتَطِيعُونَ ﴿٧٣﴾

आणि ते अल्लाहतआलाशिवाय त्यांची उपासना करतात, जे आकाशांतून आणि पृथ्वीतून त्यांना काहीही रोजी देऊ शकत नाही; आणि काही (देण्याचे) सामर्थ्य पण बाळगत नाही[१] (७३)

فَلَا تَضْرِبُوا لِلَّهِ الْأَمْثَالَ ۚ إِنَّ اللَّهَ يَعْلَمُ
وَأَنتُمْ لَا تَعْلَمُونَ ﴿٧٤﴾

बस अल्लाहतआलाकरीता उपमा देऊ नका. [२] अल्लाहतआला खूप चांगल्याप्रकारे जाणतो, आणि तुम्ही जाणत नाही. (७४)

ضَرَبَ اللَّهُ مَثَلًا عَبْدًا مَّمْلُوكًا لَّا يَقْدِرُ عَلَىٰ
شَيْءٍ وَمَن رَّزَقْنَاهُ مِنَّا رِزْقًا حَسَنًا فَهُوَ يُنفِقُ
مِنْهُ سِرًّا وَجَهْرًا ۖ هَلْ يَسْتَوُونَ ۚ الْحَمْدُ لِلَّهِ ۚ
بَلْ أَكْثَرُهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٧٥﴾

अल्लाहतआला एक उपमा वर्णन करतो की एक गुलाम आहे, दुसऱ्याच्या संपत्तीचा, जो कोण्या गोष्टीचा अधिकार बाळगत नाही. आणि एक आणखी एक मनुष्य आहे; ज्याला आम्ही, आमच्या जवळून भरपूर रोजी देऊन ठेवली आहे, ज्यांच्यातून तो गुपचुपपणे आणि उघड खर्च करीत असतो; काय हे सर्व बरोबर होऊ शकतात? [३] अल्लाहतआला करताच सर्व स्तुती आहे. किंबहुना यांच्यातून बहुतेक जाणत नाही (७५)

وَضَرَبَ اللَّهُ مَثَلًا رَّجُلَيْنِ أَحَدُهُمَا أَبْكَمُ
لَا يَقْدِرُ عَلَىٰ شَيْءٍ وَهُوَ كَلٌّ عَلَىٰ مَوْلَاهُ أَيْنَمَا
يُوَجِّههُّ لَا يَأْتِ بِخَيْرٍ ۖ هَلْ يَسْتَوِي هُوَ وَمَن
يَأْمُرُ بِالْعَدْلِ ۙ وَهُوَ عَلَىٰ صِرَاطٍ مُّسْتَقِيمٍ ﴿٧٦﴾

आणि अल्लाहतआला एक आणखी उदाहरण देतो,[४] दोन माणसांचे. ज्यांच्यातून एक तर गुंगा (बहिरा आणि मुका) आहे; आणि कोण्या गोष्टीवर अधिकार ठेवीत नाही. किंबहुना तो आपल्या मालकावर (एक) ओझे आहे. कोठेही त्याला पाठविले, तो काही भलाई आणत नाही. काय हा, आणि तो, जो न्यायाचा हुकूम देतो; [५] आणि आहे पण सरळ मार्गावर, बरोबर होऊ शकतात ? (७६)

१) म्हणजे अल्लाहला सोडून, उपासना पण, अशा लोकांची करतात, ज्यांच्याकडे कुठल्याही गोष्टीचा अधिकार नाही.

२) ज्याप्रमाणे मुशरिकीन उदाहरण देतात की, बादशाहला भेटावयाचे असेल; किंवा त्याचेशी काही काम असेल; तर कोणी सरळ मार्गाने, बादशाहला भेटूशकत नाही. त्याला प्रथम बादशाहच्या जवळच्या लोकांशी संबंध जोडावा लागतो. तेव्हा कुठे त्याची बादशाहपर्यंत पोहोचे होते. अशाच प्रकारे अल्लाहची जात उच्च आणि महान आहे, त्याच्यासाठी त्याच्यापर्यंत पोहोचण्यासाठी आम्ही त्या उपास्यांना साधन बनवितो. किंवा बुजुर्गांचा वसिला लावतो. अल्लाहतआलाने फर्माविले, तुम्ही अल्लाहला आपल्या सारखे गृहीत धरू नका. न अशा प्रकारची उदाहरणे द्या. यासाठी की तो तर एकटा (एकच) आहे. त्याच्या सारखा कोणी नाही. मग बादशाह न तर अदृष्टाचा ज्ञाता आहे, न सर्व दूर उपस्थित, आणि न समीअ आणि न बसरीर की तो कुठल्याही साधनाशिवाय, प्रजेची स्थिती आणि आवश्यकता, जाणून घेईल. जेव्हा की, अल्लाहतआला, उघड आणि गुप्त आणि उपस्थित आणि अदृष्य, प्रत्येक गोष्टीचे ज्ञान बाळगतो. रात्रीच्या अंधारात होणाऱ्या कामांनापण, तो पहातो. आणि प्रत्येकाची फिर्याद ऐकून घेण्यावरही समर्थ आहे. मग बरे, एका मानवी बादशाहची आणि सत्ताधाऱ्याशी काय तुलना आणि साधर्म्य?

३) काही म्हणतात की, हे गुलाम आणि स्वतंत्रचे उदाहरण आहे; की पहिला मनुष्य गुलाम, आणि दुसरा स्वतंत्र आहे. हे दोन्ही समान होऊं शकत नाहीत. काही म्हणतात हे ईमानवाला आणि काफिर यांचे उदाहरण आहे. पहिला काफिर आणि दुसरा ईमानवाला आहे. हे समान नाहीत. काही म्हणतात की हे अल्लाहतआला आणि निरर्थक उपास्यांचे उदाहरण आहे. पहिल्याने अभिप्रेत, निरर्थक उपास्य आहेत, आणि दुसऱ्याने अल्लाह आहे; हे दोन्ही समान होऊ शकत नाही. अर्थ हाच आहे की एक गुलाम आणि दुसरा स्वतंत्र. यावर सुद्धा की दोन्ही माणसेच आहेत. दोन्ही अल्लाहचे निर्मित आहे. आणखीही बऱ्याच गोष्टी दोघांमध्ये सारख्या आहेत. असे असून सुद्धा ते पद आणि प्रतिष्ठा आणि औदार्य व दर्जा यांत तुम्ही त्यांना समान समजत नाहीत. तर अल्लाहतआला आणि दगडाची एक मूर्ती, किंवा कबरीचा उंचवटा, हे दोन्ही कशाप्रकारे समान होऊ शकतात?

४) हे आणखी एक उदाहरण आहे; जे पहिल्यापेक्षा जास्त स्पष्ट आहे.

५) आणि प्रत्येक काम करण्यास समर्थ आहे; कारण की प्रत्येक गोष्ट बोलतो आणि समजतो. आणि आहे पण सरळ मार्गावर म्हणजे सत्य धर्मावर, आणि नबी ﷺ च्या आचरणानुसार. म्हणजे कमी जास्त केल्याशिवाय, ज्याप्रमाणे हे दोन्ही समान नाहीत, त्याचप्रमाणे अल्लाहतआला आणि त्या वस्तू, ज्यांना लोक अल्लाहचा सरकतदार ठरवितात, समान होऊ शकत नाही.

وَلِلّٰهِ غَيْبُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ وَمَاۤ اَمْرُ السَّاعَةِ
اِلَّا كَلَمْحِ الْبَصَرِ اَوْ هُوَ اَقْرَبُ ؕ اِنَّ اللّٰهَ عَلٰى كُلِّ
شَیْءٍ قَدِیْرٌ ﴿۷۷﴾

**आणि आकाश आणि पृथ्वीतील अदृष्टाचे (ज्ञान), फक्त अल्लाहतआलालाच ठाऊक [१] आहे. आणि कयामतचे घडून येणे, असेच आहे, जसे डोळ्याचे लावणे, किंबहुना यापेक्षांही जास्त समीप, नि:संशय अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीवर सर्व सामर्थ्यवान आहे. [२] ७७**

وَاللّٰهُ اَخْرَجَكُمْ مِّنْۢ بُطُوْنِ اُمَّهٰتِكُمْ لَا تَعْلَمُوْنَ
شَیْـًٔا ۙ وَّجَعَلَ لَكُمُ السَّمْعَ وَالْاَبْصَارَ وَالْاَفْـِٕدَةَ ۙ
لَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿۷۸﴾

**आणि अल्लाहतआलाने तुम्हास, तुमच्या आईच्या पोटांतून काढले आहे; की त्यावेळी तुम्ही काही पण जाणत नव्हता; [३] त्यानेच तुमचे कान आणि डोळे आणि हृदये बनविली; [४] की तुम्ही आभार मानावेत [५] ७८**

اَلَمْ یَرَوْا اِلَى الطَّیْرِ مُسَخَّرٰتٍ فِیْ جَوِّ السَّمَآءِ ؕ
مَا یُمْسِكُهُنَّ اِلَّا اللّٰهُ ؕ اِنَّ فِیْ ذٰلِكَ لَاٰیٰتٍ لِّقَوْمٍ
یُّؤْمِنُوْنَ ﴿۷۹﴾

**काय या लोकांनी पक्ष्यांना पाहिले नाही, जे हुकुमाच्या अधिन, आकाशांतील हवेत आहेत, त्यांना अल्लाहतआलाशिवाय आणखी कोणीच सांवरून नाही. [६] नि:संशय याच्यात ईमान आणणाऱ्या लोकांसाठी मोठ्या निशाण्या आहेत ७९**

وَاللّٰهُ جَعَلَ لَكُمْ مِّنْۢ بُیُوْتِكُمْ سَكَنًا وَّجَعَلَ
لَكُمْ مِّنْ جُلُوْدِ الْاَنْعَامِ بُیُوْتًا تَسْتَخِفُّوْنَهَا
یَوْمَ ظَعْنِكُمْ وَیَوْمَ اِقَامَتِكُمْ ۙ وَمِنْ اَصْوَافِهَا
وَاَوْبَارِهَا وَاَشْعَارِهَاۤ اَثَاثًا وَّمَتَاعًا اِلٰى حِیْنٍ ﴿۸۰﴾

**आणि अल्लाहतआलाने तुमच्याकरीता, तुमच्या घरांना, विश्रांतीस्थळ बनविले आहे. आणि त्यानेच तुमच्या करीता चतुष्पादांच्या कातडीची घरे बनवून दिली आहेत; ज्यांना तुम्ही हलके फुलके पावतात, आपल्या प्रस्थान करण्याच्या दिवशी, आणि मुक्काम करण्याच्या दिवशी पण. [७] आणि त्यांची लोकर, आणि लव, आणि केसांपासून, त्याने पुष्कळसे सामान आणि एक निश्चित वेळेपर्यंत फायद्याच्या वस्तू, बनविल्यांत [८] ८०**

وَاللّٰهُ جَعَلَ لَكُمْ مِّمَّا خَلَقَ ظِلٰلًا وَّجَعَلَ لَكُمْ
مِّنَ الْجِبَالِ اَكْنَانًا وَّجَعَلَ لَكُمْ سَرَابِیْلَ تَقِیْكُمُ
الْحَرَّ وَسَرَابِیْلَ تَقِیْكُمْ بَاْسَكُمْ ؕ كَذٰلِكَ یُتِمُّ
نِعْمَتَهٗ عَلَیْكُمْ لَعَلَّكُمْ تُسْلِمُوْنَ ﴿۸۱﴾

**आणि अल्लाहनेच तुमच्यासाठी, आपल्या निर्माण केलेल्या वस्तुंमधून, सांवल्या बनविल्या आहेत; [९] आणि त्यानेच, तुमच्यासाठी, पर्वतांत गुहा बनविल्या आहेत. आणि त्यानेच तुमच्या करीता, सदरे बनविले आहेत, जे तुम्हाला उष्णतेपासून वांचवितात; आणि असे सदरे पण, जे तुम्हाला युद्धाच्या वेळेस काम यावेत [१०] तो अशाचप्रकारे आपल्या पूर्ण पूर्ण देणग्या देत आहे की, तुम्ही आज्ञाधारक बनून जावे ८१**

فَاِنْ تَوَلَّوْا فَاِنَّمَا عَلَیْكَ الْبَلٰغُ الْمُبِیْنُ ﴿۸۲﴾

**तरी सुद्धा जर हे तोंड फिरवतील, तर तुम्हावर फक्त स्पष्ट करून, प्रचार करून देणेच आहे ८२**

١١ ع ٧ ١٧ یَعْرِفُوْنَ نِعْمَتَ اللّٰهِ ثُمَّ یُنْكِرُوْنَهَا وَاَكْثَرُهُمُ
الْكٰفِرُوْنَ ﴿۸۳﴾ ع

११ ع ७ १७ **हे अल्लाहच्या देणग्या, जाणून ओळखून सुद्धा, त्यांना नाकारणारे होत आहेत; किंबहुना यांच्यातून बहुतेक कृतघ्न आहेत [११] ८३**

وَیَوْمَ نَبْعَثُ مِنْ كُلِّ اُمَّةٍ شَهِیْدًا ثُمَّ لَا یُؤْذَنُ
لِلَّذِیْنَ كَفَرُوْا وَلَا هُمْ یُسْتَعْتَبُوْنَ ﴿۸۴﴾

**आणि ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहातून साक्षीदार उभा करू [१२] मग न काफिरांना परवानगी दिली जाईल आणि न त्यांना क्षमायाचना करण्यास सांगण्यात येईल. ८४**

१) म्हणजे आकाश व पृथ्वी यात ज्या गोष्टी अदृष्य आहेत, आणि ज्या न मोजता येणाऱ्या आहेत; आणि यांतच कयामत (च्या घटक) चे ज्ञान आहे. त्याचे ज्ञान अल्लाहशिवाय कोणालाही नाही. म्हणून उपासनेच्या लायक पण, फक्त एक अल्लाह आहे; कोणी मूर्त्या, किंवा मृत पावलेली माणसे, नाही ज्यांना कुठल्याही प्रकारचे ज्ञान नाही. तसेच ते कुठल्याही प्रकारचा नफा आणि नुकसान पोहचविण्यास समर्थ नाहीत.

२) म्हणजे त्याच्या परिपूर्ण सामर्थ्याचा पुरावा आहे की, हे विस्तृत आणि अतिरूंद ब्रम्हांड, त्याच्या हुकुमाने, पापणी लवतांच, किंबहुना याच्यापेक्षा सुद्धा कमी वेळांत, नष्ट आणि बर्बाद होऊन जाईल. ही गोष्ट अतिशयोक्ती म्हणून नाही, किंबहुना एक वास्तविक घडणारी घटना आहे. कारण की त्याचे सामर्थ्य अमर्याद आहे, ज्याची आम्ही कल्पनाच करूंशकत नाही. त्याचा एक शब्द ''कुन'' ने ते सर्व काही होऊन जाते, जे तो इच्छितो, तर ही कयामत सुद्धां, त्याच्या 'कुन' (होऊनजा) म्हणण्याने घडून येईल.

३) 'शयअन' म्हणजे तुम्ही काहीच समजत नव्हता. न सुदैव आणि दुर्दैवाला, तसेच फायदा आणि नुकसानाला.

४) कारण कानामार्फत तुम्ही आवाज ऐकावेत. डोळ्यांनी वस्तूंना पहावे, आणि अंत:करण म्हणजे अक्कल (कारण की अक्लेचे केंद्र, अंत:करण (मन) आहे.) दिली, ज्यामुळे वस्तू दर्म्यान भेदाभेद करू शकावे. आणि नफा नुकसानीला ओळखूंशकावे. जस जसा मनुष्य मोठा होतो, या समजण्या बुझण्यात सुद्धा, वाढ होत जाते; येथ पावेतो की, जेव्हां मनुष्य, जाण आणि तारूण्याला पोहचतो, त्याची ही क्षमतापण, मजबुत होऊन जाते; येथपावेतो की मग कमाल अवस्थेला पोंहचून जाते.

५) म्हणजे या कार्यक्षमता आणि सामर्थ्य, अल्लाहतआलाने यासाठी दिल्या आहेत की, मनुष्याने या अवयवांना अशाप्रकारे उपयोगांत आणावे, ज्यामुळे अल्लाहतआला प्रसन्न होऊन जावा. त्यांच्याने अल्लाहतआलाची उपासना आणि आज्ञापालन केले जावे. हेच अल्लाहतआलाचे कर्मिक आभार मानणे आहे. हदीसमध्ये येते, ''माझा बंदा, ज्या गोष्टीच्या मार्फत माझे सामिप्य प्राप्त करतो, त्यांच्या सर्वांत जास्त प्रिय त्या वस्तूंआहेत, ज्या मी त्याच्यावर अनिवार्य (फर्ज) केल्या आहेत. याशिवाय नफील (ऐच्छीक) च्या मार्फत पण, तो माझे सामिप्य प्राप्त करण्याचा प्रयत्न करतो; येथपावेतो की, मी त्याच्याशी प्रेम करू लागतो; आणि जेव्हा मी त्याच्याशी प्रेम करू लागतो, तर मी त्याचा कान होऊन जातो, ज्याने तो ऐकतो. डोळे होऊन जातो, ज्याने तो पाहतो. हात होऊन जातो, ज्याने तो धरतो. पाय होऊन जातो ज्याच्याने तो चालतो. आणि तर तो मजजवळ कांही मागतो, तर मी ते त्याला देतो. आणि जर तो कोण्या गोष्टीपासून माझा आश्रय मागतो तर मी त्याला (त्या गोष्टीपासून) आश्रय देतो'' (स.बुखारी) या हदीसचा काही लोक चुकीचा भावार्थ घेऊन, अवलिया अल्लाहना अल्लाहच्या अधिकारांचा उपयोग करणारे आहेत असे भासवितात. वास्तविक हदीसचा स्पष्ट अर्थ हा आहे की, जेव्हा बंदा (सेवक) आज्ञापालन आणि उपासना अल्लाहसाठीच निव्वळ करून घेतो, तर मग त्याचे प्रत्येक काम, फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेसाठीच असते. आपल्या कानांनी तीच गोष्ट ऐकतो, आणि आपल्या डोळ्यांनी तीच गोष्ट पाहतो, ज्याची अल्लाहतआलाने परवानगी दिली आहे. ज्या वस्तुला हाताने पकडतो, किंवा पायाने चालून, तिच्याकडे जातो, तर ती तीच वस्तू असते, जिला धर्मशास्त्राने विहीत (हलाल) ठेवले आहे; आणि त्यांना अल्लाहच्या आज्ञाभंजनांत, उपयोगात आणित नाही. किंबहुना फक्त, अल्लाहच्या आज्ञापालनांत, उपयोगांत आणतो.

६) हा अल्लाहतआलाच आहे, ज्याने पक्ष्यांना, अशाप्रकारे उडण्याची, आणि हवेला, त्यांच्या आपल्या बाजुंवर, उचलून धरण्याची ताकद दिली.

७) म्हणजे चामड्याने तंबू, ज्यांना तुम्ही प्रवासांत सहजगत्या उचलून फिरत असतात. आणि जेथे आवश्यकता पडते, तेथे त्यांना खेंचून तिव्रतेपासून, आपल्याला सुरक्षित करून घेतो.

८) 'असवाफ', 'सूफ' चे अनेवचन आहे. मेंढीची लोकर 'अवबार' 'वबर' चे अनेकवचन. उंटाचे केस. 'अशआर' 'शअर' चे अनेकवचन. ढुंबा आणि बकरींचे केस. यांच्यापासून कित्येक प्रकारच्या वस्तू तयार होतात. ज्याच्याने माणसाला पैसे पण मिळतात; आणि त्यांच्याने (तो) एका विशिष्ट वेळेपर्यंत फायदापण उचलतो.

९) म्हणजे वृक्ष ज्याच्यापासून सांवली मिळवली जाते.

१०) म्हणजे लोकर आणि कापसाचे कपडे जे सर्व साधारण परिधान करण्यांत येतात आणि लोखंडाचे शिरस्त्राण आणि चिलखते, जी युद्धांत घातली जातात.

११) म्हणजे या गोष्टीला जाणतात आणि समजतात की या साऱ्या देणग्या निर्माण करणारा, आणि त्यांना उपयोगात आणण्याची क्षमता प्रदान करणारा, फक्त अल्लाहतआला आहे. तरी सुद्धांअल्लाहला नाकारतात; आणि बहुतेक कृतघ्नता करतात; म्हणजे अल्लाहला सोडून, दुसऱ्यांची उपासना करतात.

१२) म्हणजे प्रत्येक जनसमूहावर, त्या जनसमूहाचा पैगंबर साक्ष देईल की, त्यांना अल्लाहचा संदेश पोहचवून देण्यात आला होता. परंतु त्यांनी त्याची पर्वा केली नाही. त्या काफिरांना सबब पुढे करण्याची परवानगी पण दिली जाणार नाही. यासाठी की त्यांच्याजवळ वास्तवांत कुठलीही सबब किंवा तर्क असणारच नाही. न त्यांच्याकडून क्षमायाचना मागणी केली जाईल. कारण याची आवश्यकतापण तेव्हा पडते जेव्हा कोणाला सवलत देण्याचा उद्देश्य असतो. 'ला युसतअ्तबून' चा एक दुसरा अर्थ हा केला गेला आहे की, त्यांना आपल्या पालनकर्त्याला प्रसन्न करून घेण्याची संधी दिली जाणार नाही. कारण ती संधी तर त्यांना जगांत, दिली जाऊन चुकली आहे, जे कर्म करण्याचे घर आहे. परलोक तर कर्म करण्याचे घर नाही. ते तर बदला देण्याचे घर आहे. तेथे तर त्या गोष्टीचा बदला मिळेल, जे मनुष्य या जगांतून घेऊन गेला असेल; तेथे काही करण्याची संधी कोणास दिली जाणार नाही.

وَإِذَا رَأَى الَّذِينَ ظَلَمُوا الْعَذَابَ فَلَا يُخَفَّفُ عَنْهُمْ
وَلَا هُمْ يُنْظَرُونَ ﴿٨٥﴾

**आणि जेव्हा हे जालीम शिक्षा पाहून घेतील, तर मग न त्यांच्यावरून शिक्षा हलकी केली जाईल, न त्यांना ढिल दिली जाईल[१] ८५**

وَإِذَا رَأَى الَّذِينَ أَشْرَكُوا شُرَكَاءَهُمْ قَالُوا رَبَّنَا
هَٰؤُلَاءِ شُرَكَاؤُنَا الَّذِينَ كُنَّا نَدْعُو مِنْ دُونِكَ ۖ
فَأَلْقَوْا إِلَيْهِمُ الْقَوْلَ إِنَّكُمْ لَكَاذِبُونَ ﴿٨٦﴾

الثلث

**आणि जेव्हा मुशरिकीन आपल्या सरकतदारांना पाहून घेतील, तर म्हणतील की, हे आमच्या पालनकर्त्या! हेच आमचे ते सरकतदार आहेत, ज्यांना आम्ही, तुला सोडून बोलावित असू. मग ते त्यांना उत्तर देतील की, तुम्ही फारच लबाड आहात[२] ८६**

وَأَلْقَوْا إِلَى اللَّهِ يَوْمَئِذٍ السَّلَمَ ۖ وَضَلَّ عَنْهُمْ مَا
كَانُوا يَفْتَرُونَ ﴿٨٧﴾

**आणि त्या दिवशी ते सर्व (हतबल होऊन) अल्लाह समोर आज्ञापालन करण्याची मान्यता पुढे करतील; आणि जे कुभांड रचित होते, ते सर्व त्यांच्यापासून नाहीसे होऊन जाईल ८७**

الَّذِينَ كَفَرُوا وَصَدُّوا عَنْ سَبِيلِ اللَّهِ زِدْنَاهُمْ
عَذَابًا فَوْقَ الْعَذَابِ بِمَا كَانُوا يُفْسِدُونَ ﴿٨٨﴾

**ज्यांनी कुफ्र केले, आणि अल्लाहच्या मार्गापासून अडविले, आम्ही त्यांना शिक्षेवर शिक्षा वाढवत जाऊ; [३] हा बदला असेल त्यांचा फिसाद खोरीचा ८८**

وَيَوْمَ نَبْعَثُ فِي كُلِّ أُمَّةٍ شَهِيدًا عَلَيْهِمْ مِنْ
أَنْفُسِهِمْ ۖ وَجِئْنَا بِكَ شَهِيدًا عَلَىٰ هَٰؤُلَاءِ ۚ
وَنَزَّلْنَا عَلَيْكَ الْكِتَابَ تِبْيَانًا لِكُلِّ شَيْءٍ
وَهُدًى وَرَحْمَةً وَبُشْرَىٰ لِلْمُسْلِمِينَ ﴿٨٩﴾

ع ١٢/١٨

**आणि ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहातून, त्यांच्यातूनच त्यांच्या मुकाबल्यात, साक्षीदार, उभा करू आणि तुला या सर्वांवर, साक्षीदार बनवून आणू[४] आणि आम्ही तुजवर हे पुस्तक अवतरीत केले आहे, ज्याच्यांत प्रत्येक गोष्टीचे समर्पक विवेचन [५] आहे. आणि हिदायत आणि रहमत आणि शुभवार्ता आहे, मुसलमानांकरीता ८९**

१२ ९ १८

إِنَّ اللَّهَ يَأْمُرُ بِالْعَدْلِ وَالْإِحْسَانِ وَإِيتَاءِ ذِي
الْقُرْبَىٰ وَيَنْهَىٰ عَنِ الْفَحْشَاءِ وَالْمُنْكَرِ وَالْبَغْيِ ۚ
يَعِظُكُمْ لَعَلَّكُمْ تَذَكَّرُونَ ﴿٩٠﴾

**नि:संशय अल्लाहतआला न्यायाचा, भलाईचा आणि नातेवाईकांशी (चांगले) वर्तन करण्याचा हुकूम देत आहे. आणि निर्लज्जपणाची कामे, वाईट वर्तणूक, आणि जुलूम आणि अत्याचारापासून मना करतो[६] तो स्वत: तुम्हास उपदेश करीत आहे की, तुम्ही उपदेश माना ९०**

१) हलके न करण्याचा अर्थ, शिक्षेच्या दर्म्यान का ही अंतर ठेवले जाणार नाही. शिक्षा आणि सतत थांबल्याशिवाय, शिक्षा होत राहील. तसेच कुठलीही ढिल दिली जाणार नाही. म्हणजे त्यांना लगेच लगामा घालून आणि साखळदंडांनी जखडून, नरकाग्नीत फेकून देण्यात येईल. किंवा पश्चात्ताप व्यक्त करण्याची संधी दिली जाणार नाही; कारण परलोक कर्म करण्याची जागा नाही, बदला मिळण्याचे ठिकाण आहे.

२) खोट्या उपास्यांची पुजा करणारे, आपल्या ह्या दाव्यात तर लबाड असणार नाही; परंतु ते सरकतदार, ज्यांना अल्लाहचा सरकतदार ठरवीत होते, म्हणतील हे लबाड आहेत. हे एकतर सरकतदार करण्याला नकार आहे; म्हणजे आम्हांला अल्लाहचा सरकतदार ठरविण्यात हे लबाड आहेत. पहा बरे!अल्लाहचा सरकतदार कोण होऊं शकतो ? किंवा यासाठी त्यांना लबाड ठरवतील की त्यांच्या उपासनेपासून ते बिलकुल अनभिज्ञ होते. ज्याप्रमाणे कुरआन करीमने अनेक ठिकाणी, या गोष्टीला वर्णन केले आहे. उदाहरणार्थ, ''आमच्या आणि तुमच्या दर्म्यान, अल्लाह पुरेसा साक्ष आहे. की, आम्ही या गोष्टीपासून अनभिज्ञ होतो की, तुम्ही आमची उपासना करीत होते.'' (सू. यूनुस-२९) आणखी पहावे सू.अहकाफ आ.५-६, सू.मर्यम आ.८१,८२ सू.अन्कबुत ० २५, सू. कहफ०५२, वगैरे. एक हा अर्थपण होऊ शकतो, की तुम्हास आमची उपासना करण्यास कधी सांगितले नव्हते; म्हणून तुम्हीच खोटारडे आहांत. हे सरकतदार जर दगड आणि वृक्ष असतील, तर अल्लाहतआला त्यांना बोलण्याची शक्ती प्रदान करील; जिन्नात आणि शैतान असतील तर मग काही अडचणच नाही. आणि जर अल्लाहचे सदाचरणी सेवक असतील; ज्याप्रमाणे की, निरनिराळे पुण्यवान, लोक, अल्लाहला भिणारे लोक आणि अवलिया अल्लाहना लोक मदतीसाठी बोलावितात, त्यांच्या नांवाचा नवस करतात, आणि त्यांच्या कबरीवर जाऊन अशाप्रकारे त्यांना सन्मानित करतात, ज्याप्रमाणे कोण्या उपास्यांची भय आणि प्रसन्न करून घेण्याच्या भावनेने उपासना करण्यांत येते. तेव्हा अल्लाहतआला त्यांना हशरच्या मैदानांतच निर्दोष सोडून देईल. आणि त्यांची उपासना करणाऱ्यांना, नरकाग्नीत टाकून देण्यात येईल.

जसे की, ईसा ﷺ ला, अल्लाहतआलाचा प्रश्न, आणि त्यांचे उत्तर, सू.माईद: च्या शेवटी आलेले आहे.
३) ज्याप्रमाणे स्वर्गांत ईमानवाल्यांचे, वेगवेगळे दर्जे असतील, अशाचप्रकारे नरकाग्नीमध्ये, काफिरांच्या शिक्षेंत फरक राहील. जे मार्गभ्रष्ट होण्याबरोबरच, दुसऱ्यांना मार्गभ्रष्ट होण्याला कारणीभूत झालेले असतील, त्यांची शिक्षा दुसऱ्यांच्या तुलनेत जास्त तिव्र असेल.
४) म्हणजे प्रत्येक पैगंबर आपल्या उम्मतीवर साक्ष देईल, आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि त्यांच्या उम्मतचे लोक, पैगंबरांच्या बाबतीत साक्ष देतील की, हे खरे आहेत. त्यांनी खचित्च तुझा संदेश पोहचवून दिला होता. (स.बुखारी तफसीर सू.निसा)
५) पुस्तकाने अभिप्रेत, अल्लाहचे पुस्तक, आणि नबी ﷺ चे विवेचन (हदीशी) आहेत. आपल्या हदीशींना सुद्धा, अल्लाहच्या पैगंबराने ''अल्लाहचे पुस्तक'' ठरविले आहे; जसे की, असीफच्या गोष्टीत वगैरे आहे. (कृपया पहावे, स.बुखारी) आणि प्रत्येक गोष्टीचा अर्थ आहे, भूतकाळांतील आणि भविष्यातील त्या बातम्या, ज्यांचे ज्ञान आवश्यक आणि फायदेकारक आहे. अशाचप्रकारे, हराम आणि हलालचा तपशिल, आणि त्या गोष्टी, ज्यांचे धर्म आणि इहलोक, रोजी आणि परतून जाण्याचे ठिकाणाच्या मामल्यात, म्हणजे कयामत मनुष्ये गरजूआहेत. कुरआन व हदीसमध्ये, दोहोत, या सर्व गोष्टी, स्पष्ट करून देण्यात आल्या आहेत.
६) 'अद्ल' चा प्रसिद्ध अर्थ न्याय करण्याचा आहे. म्हणजे आपल्यावाल्यांत आणि ज्यांच्याशी काही नातेसंबंध नाही, अशा सर्वांबरोबर न्याय केला जावा. कोणाबरोबर शत्रुत्व किंवा द्वेष किंवा प्रेम किंवा नातेसंबंधामुळे न्याय डावला जाऊ नये. एक दुसरा अर्थ समतोल आहे. म्हणजे कुठल्याही मामल्यांत अति किंवा कमी करण्याचा प्रयत्न केला जाऊ नये. येथपर्यंत की, धर्माच्या मामल्यांत सुद्धा. कारण की धर्मात अती करण्याचा परिणाम 'गुलू' आहे. जो फारच नींदणीय आहे. आणि कमी करणे, धर्मांत कोताई आहे; हे पण नापसंत आहे.

'एहसान' चा एक अर्थ, चांगली वागणूक, क्षमा करणे आणि विसरणे आणि माफ करून टाकण्याचे आहे. दुसरा अर्थ, जास्तीचा आहे, म्हणजे वाजीब हक्कांशिवाय, जास्त देणे. किंवा ठरवून दिलेल्या कर्मांशिवाय जास्त कर्म करणे. उदाहरणार्थ कोण्या कामाची मजुरी शंभर रूपये ठरलेली आहे; परंतु देतेवेळी, १०,२० रुपये जास्त देऊन देणे. ठरलेले शंभर रूपये देणे वाजीब हक्क आहे, आणि हे न्याय्य आहे. जास्तीचे १०/२० हा एहसान (उपकार) आहे. न्यायाने पण समाजांत शांती कायम होते. परंतु एहसानामुळे (उपकार) आणखी चांगुलपणा आणि आपुलकीची भावना, आणि त्यागाची भावना, वाढीस लागतात. आणि कर्त्यव्याची पूर्ती करत असतांना, नफली अदा करण्याची काळजी, वाजीब कर्मापेक्षा, जास्त कर्म आहे. ज्यामुळे अल्लाहचे खास सामिप्य प्राप्त होते. एहसानचा एक तिसरा अर्थ, कर्माची निखालसता, आणि चांगली उपासना आहे. ज्याला हदीसमध्ये, ''अल्लाहची उपासना अशाप्रकारे करा, जणू तुम्ही त्याला पहात आहात....'' ने व्यक्त करण्यांत आले आहे. ''नातेवाईकांचा हक्क अदा करणे, म्हणजे त्यांची मदत करणे.'' याला हदीसमध्ये 'सिला रहमी' म्हणण्यात आले आहे. आणि याची फारच ताकीद हदीशींमध्ये आलेली आहे. अद्ल (न्याय) आणि एहसान (उपकार) नंतर, याचा वेगळा उल्लेख, हा पण 'सिला रहमी' च्या महत्त्वाला स्पष्ट करतो. ''फहशा' ने अभिप्रेत निर्लज्जपणाची कामे आहेत. आजकाल निर्लज्जपणा इतका सर्वसाधारण होऊन गेला आहे की, त्याचे नाव शिष्टाचार, प्रगती आणि कला, ठरून गेले आहे. 'चांगले वाटण्याच्या नांवावर, त्याचे करणे मान्य करण्यात आले आहे. तथापि निव्वळ सुंदर सुंदर लेबले लाऊन टाकल्याने, कोण्या गोष्टीची वास्तविकता बदलू शकत नाही. अशाचप्रकारे इस्लामच्या धर्म शास्त्राने, व्याभिचार आणि त्या संबंधीचे खटल्यांना, नाच व गाणी, पर्दा न करणे, फॅशनेबल वृत्तीला, आणि स्त्री पुरूषांचे काही धरबंद नसलेले, एक दुसऱ्यांत मिसळणे, आणि सर मिसळ समाजांत वावर, आणि दुसऱ्या अशा प्रकारच्या वाईट गोष्टींना, निर्लज्जपणाच ठरविण्यांत आला आहे. त्यांचे कितीही चांगले नांव ठेवले जाईल तरी पश्चिमेकडून आलेल्या या घाणेरड्या गोष्टी, योग्य ठरूंशकत नाहीत. 'मुनकर', प्रत्येक ते काम आहे, ज्याला धर्मशास्त्राने नापसंत ठरविलेले आहे. आणि 'बगयुन' चा अर्थ जुलूम आणि अत्याचार करणे, एका हदीसमध्ये सांगण्यात आले आहे की, नातेसंबंध तोडणे आणि 'बगयुन', (जुलुम आणि अत्त्याचार) हे दोन्ही अपराध अल्लाहला इतके नापसंत आहेत की, अल्लाहतआलाकडून, (परलोकाशिवाय) या जगांत सुद्धा त्यांची तात्कालीक शिक्षा होण्याची शक्यता प्रबळ राहते. (इब्ने माजा किताबुल जहद, बाबुल बग्य)

وَاَوۡفُوۡا بِعَهۡدِ اللّٰهِ اِذَا عٰهَدْتُّمۡ وَلَا تَنۡقُضُوا الۡاَيۡمَانَ بَعۡدَ تَوۡكِيۡدِهَا وَقَدۡ جَعَلۡتُمُ اللّٰهَ عَلَيۡكُمۡ كَفِيۡلًا ؕ اِنَّ اللّٰهَ يَعۡلَمُ مَا تَفۡعَلُوۡنَ ﴿۹۱﴾

आणि अल्लाहच्या कराराला पूर्ण करा; जेव्हा की तुम्ही आपसांत करार मदार कराल; आणि शपथांना त्यांच्या पक्क्या झाल्यानंतर, तोडू नका; यावर सुद्धा की, तुम्ही अल्लाहतआलाला आपला जामीन ठरवून चुकला आहांत; [१] तुम्ही जे काही करत आहांत, अल्लाह त्याला फार चांगल्या प्रकारे जाणत आहे. ९१

وَلَا تَكُوۡنُوۡا كَالَّتِىۡ نَقَضَتۡ غَزۡلَهَا مِنۡۢ بَعۡدِ قُوَّةٍ اَنۡكَاثًا ؕ تَتَّخِذُوۡنَ اَيۡمَانَكُمۡ دَخَلًاۢ بَيۡنَكُمۡ اَنۡ تَكُوۡنَ اُمَّةٌ هِىَ اَرۡبٰى مِنۡ اُمَّةٍ ؕ اِنَّمَا يَبۡلُوۡكُمُ اللّٰهُ بِهٖ ؕ وَلَيُبَيِّنَنَّ لَـكُمۡ يَوۡمَ الۡقِيٰمَةِ مَا كُنۡتُمۡ فِيۡهِ تَخۡتَلِفُوۡنَ ﴿۹۲﴾

आणि त्या स्त्रीसारखे होऊन जाऊ नका, जिने आपले सुत मजबुत कांतल्यानंतर, तुकडे तुकडे करून तोडून टाकले; [२] की, तुम्ही आपल्या शपथा, आपसातील मक्रला, कारणीभूत बनवाव्यास यांसाठी [३] की, एक समूह, दुसऱ्या समूहाहून वरचढ होऊन जावा; [४] गोष्ट फक्त एवढीच आहे की, या शपथेने अल्लाह तुमहांस अजमावित आहे; खचित्च अल्लाहतआला, तुमच्याकरीता कयामतच्या दिवशी, प्रत्येक त्या गोष्टीला उघड करून, सांगून टाकेन, जिच्यांत तुम्ही मतभेद करीत होता. ९२

وَلَوۡ شَآءَ اللّٰهُ لَجَعَلَكُمۡ اُمَّةً وَّاحِدَةً وَّلٰـكِنۡ يُّضِلُّ مَنۡ يَّشَآءُ وَيَهۡدِىۡ مَنۡ يَّشَآءُ ؕ وَلَـتُسۡـئَـلُنَّ عَمَّا كُنۡتُمۡ تَعۡمَلُوۡنَ ﴿۹۳﴾

जर अल्लाह इच्छिता, तर तुम्हास सर्वांस एकच समूह बनवून देता; परंतु तो ज्याला इच्छितो, मार्गभ्रष्ट करतो; आणि ज्याला इच्छितो, हिदायत देतो; खचित्च तुम्ही जे काही करीत आहांत, त्याच्या बाबतीत विचारपूस होणार आहे ९३

وَلَا تَتَّخِذُوۡۤا اَيۡمَانَكُمۡ دَخَلًاۢ بَيۡنَكُمۡ فَتَزِلَّ قَدَمٌۢ بَعۡدَ ثُبُوۡتِهَا وَتَذُوۡقُوا السُّۤوۡءَ بِمَا صَدَدْتُّمۡ عَنۡ سَبِيۡلِ اللّٰهِ ۚ وَلَـكُمۡ عَذَابٌ عَظِيۡمٌ ﴿۹۴﴾

आणि आपल्या शपथांना आपसांतील लबाडीला बहाणा बनवू नका; मग तर तुमचे पाय, आपल्या मजबुतीनंतर, उखडून जातील, आणि तुम्हास कडक शिक्षा भोगावी लागेल; कारण की तुम्ही, अल्लाहच्या मार्गापासून, अडवून टाकले, आणि तुम्हास मोठी कडक शिक्षा होईल [५] ९४

१) शपथ, एक तर ती आहे, जी जेव्हा कोण्या करार व मदारावर, त्याला पक्के करण्यासाठी, घेण्यांत येते. दुसरी शपथ ती आहे, जी मनुष्य, आपल्याकडून कोण्यावेळी घेतो; की मी अमुक काम करीन, किंवा करणार नाही. येथे, महावाक्यांत प्रथम, अल्लाहची शपथ अभिप्रेत आहे. की, तुम्ही शपथ खाऊन, अल्लाहला जमानतदार केले आहे. आता तिला तोडावयाचे नाही; किंबहुना या करारमदाराला पूर्ण करावयाचे आहे, ज्यावर तुम्ही शपथ घेतली आहे; कारण की, दुसऱ्या प्रकारच्या शपथेच्या बाबतीत, हदीसमध्ये हुकूम देण्यात आला आहे की, ''कोणी मनुष्य, कोण्या कामाच्या बाबतीत शपथ घेऊन घेईल; मग त्याला असे आढळून येईल की, जास्त भले, दुसऱ्या गोष्टीत आहे. (म्हणजे शपथेच्या विरूद्ध करण्यांत आहे.) तर त्याने ज्यांत जास्त बेहतर आहे, त्या कामाला अंगीकारावे; आणि शपथेला तोडून, त्याचे प्रायश्चित्त घ्यावे. (स.मुस्लीम क्र. १२७२) नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचा पण असाच रवैय्या होता. (स.बुखारी क्र.६६२३ स.मुस्लीम क्र.१२६२)

२) म्हणजे शपथ घेऊन, पक्क्या कराराला तोडून टाकणे असे आहे, जसे कोण्या स्त्रीने सूत कांतल्यावर, त्याला स्वत:च तुकडे तुकडे करून टाकावे. ही उपमा आहे.

३) म्हणजे धोका देणे, आणि फसवणूक करण्याचे साधन बनवावे.

४) 'अरबा' चा अर्थ बहुतेक असा आहे. जेव्हांतुम्ही पाहाल की, आतांतुम्ही बहुसंख्य होऊन गेला आहांत, तर आपल्या संख्या बाहुल्याने, कराराला तोडून टाका; जेव्हा की शपथ आणि कराराच्या वेळी, तो समूह दुर्बल होता.परंतु दुर्बल असून सुद्धा, तो समाधानी होता की, करारामुळे आम्हांस नुकसान पोहचवले जाणार नाही. परंतु तुम्ही लढाई आणि वचन भंग करून, नुकसान पोहचवाल. आज्ञानकाळंत, चारित्र्याच्या ऱ्हासामुळे, अशा प्रकारचा वचनभंग, सर्व साधारण असावयाचा. मुसलमानांना या चारित्र्याच्या ऱ्हासापासून मना करण्यांत आले आहे.

५) मुसलमानांना दुसऱ्यांदा, चर्चित वचनभंगापासून मना करण्यांत येत आहे; की, कोठे असे न व्हावे, तुमच्या या चारित्र्याच्या गिरावटीमुळे, कोणाचा पाय डगमगूंलागावे. आणि काफिर तुमचा हा रवैय्या पाहून, इस्लामांत प्रवेश करण्यापासून थांबून जावेत. आणि अशाप्रकारे तुम्ही लोकांना, अल्लाहच्या मार्गापासून, अडथळा करणारे अपराधी, आणि शिक्षेला पात्र बनवूंन जावे. काही भाष्यकारांनी, 'अय्मान' ने रसूलुल्लाह सल्ल. अलैहि व सल्लम ची बैत अभिप्रेत धरली आहे. म्हणजे पैगंबरांशी केलेला करार (वचन) तोडून, मग इस्लामकडून फिरून न जाणे. (मुरतद होणे) तुमच्या रवैय्याला पाहून, दुसरे लोक पण, इस्लाम कबूल करण्यापासून थांबून जावेत. आणि अशाप्रकारे तुम्ही दुप्पट शिक्षेला पात्र ठरावे. (फत्हुल कदीर)

وَلَا تَشْتَرُوا بِعَهْدِ اللَّهِ ثَمَنًا قَلِيلًا ۚ إِنَّمَا عِندَ اللَّهِ
هُوَ خَيْرٌ لَّكُمْ إِن كُنتُمْ تَعْلَمُونَ ﴿٩٥﴾

**आणि तुम्ही अल्लाहशी केलेल्या कराराला, अल्प किंमतीच्या बदल्यात, विकून टाकीत जाऊ नका. लक्षात ठेवा अल्लाहजवळचीच वस्तू, तुमच्याकरीता उत्तम आहे; जर तुम्हास ज्ञान असेल ९५**

مَا عِندَكُمْ يَنفَدُ ۖ وَمَا عِندَ اللَّهِ بَاقٍ ۗ وَلَنَجْزِيَنَّ
الَّذِينَ صَبَرُوا أَجْرَهُم بِأَحْسَنِ مَا كَانُوا
يَعْمَلُونَ ﴿٩٦﴾

**तुमच्याजवळ जे काही आहे ते नष्ट होणारे आहे; आणि अल्लाहजवळ जे काही आहे, ते बाकी राहणारे आहे. आणि सहनशिलता पत्करणाऱ्यांना आम्ही, चांगल्या कर्मांचा उत्तम बदला, अवश्य प्रदान करू. ९६**

مَنْ عَمِلَ صَالِحًا مِّن ذَكَرٍ أَوْ أُنثَىٰ وَهُوَ مُؤْمِنٌ
فَلَنُحْيِيَنَّهُ حَيَاةً طَيِّبَةً ۖ وَلَنَجْزِيَنَّهُمْ أَجْرَهُم
بِأَحْسَنِ مَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿٩٧﴾

**जो मनुष्य पुण्याची कर्मे करील, (मग तो) पुरूष असो अथवा स्त्री, परंतु ईमानवाला असावा; तर आम्ही त्याला खचित्‌च, फारच उत्कृष्ट जीवन प्रदान करू. (१) आणि त्यांच्या चांगल्या कामांचा, उत्तम बदला पण त्यांना जरूर जरूर देऊ ९७**

فَإِذَا قَرَأْتَ الْقُرْآنَ فَاسْتَعِذْ بِاللَّهِ مِنَ الشَّيْطَانِ
الرَّجِيمِ ﴿٩٨﴾

**कुरआन पढतेवेळी, धोंडमार करून पिटाळलेल्या शैतानाकडून, अल्लाहचा आश्रय मागीत जा. (२) ९८**

إِنَّهُ لَيْسَ لَهُ سُلْطَانٌ عَلَى الَّذِينَ آمَنُوا وَعَلَىٰ
رَبِّهِمْ يَتَوَكَّلُونَ ﴿٩٩﴾

**ईमानवाल्यांवर, आणि आपल्या पालनकर्त्यावर भरोसा ठेवणाऱ्यांवर, त्याचा काहीच जोर चालत नाही. ९९**

إِنَّمَا سُلْطَانُهُ عَلَى الَّذِينَ يَتَوَلَّوْنَهُ وَالَّذِينَ هُم
بِهِ مُشْرِكُونَ ﴿١٠٠﴾

**हां! त्याचे वर्चस्व तर त्यांच्यावर अवश्य आहे, जे त्याच्याशी मैत्री करतील; आणि त्याला अल्लाहचा सरकतदार ठरवतील १००**

وَإِذَا بَدَّلْنَا آيَةً مَّكَانَ آيَةٍ ۙ وَاللَّهُ أَعْلَمُ بِمَا
يُنَزِّلُ قَالُوا إِنَّمَا أَنتَ مُفْتَرٍ ۚ بَلْ أَكْثَرُهُمْ
لَا يَعْلَمُونَ ﴿١٠١﴾

**आणि जेव्हा आम्ही कोण्या महावाक्याच्या जागी, दुसरे महावाक्य बदलून देतो, आणि जे काही अल्लाहतआला अवतरीत करतो, त्याला तो खूप चांगल्याप्रकारे जाणतो; तर हे म्हणतात की, तू तर कुभांड रचणारा आहेस; गोष्ट अशी आहे की, यांच्यातून बहुकेत जाणतच नाही. (३) १०१**

१) पवित्र जीवनाने अभिप्रेत ऐहिक जीवन आहे, यासाठी की, पारलौकीक जीवनाचा उल्लेख तर पुढील महावाक्यांत आहे. आणि अर्थ हा आहे की, एक ईमानवाला, चांगली कृत्ये करणारा, पुण्यशील आणि अल्लाहला भिऊन जीवन जगणारा, आणि अल्लाहची उपासना आणि आज्ञापालन करणारा, आणि संयम आणि समाधानात जी चव आणि गोडी जाणवते, ती एका काफिराला आणि आज्ञाभंजकाला, दुनियाभराच्या सुखसोयींनी आणि सवलती असूनसुद्धा, त्याला मिळत नाही. किंबहुना तो एकाप्रकारे, घबराट आणि बेचैनीचा बळी असतो. ''ज्याने माझ्या स्मरणाकडून, तोंड फिरविले, त्यांची गुजराण तंगीत होईल.'' (सू. ताहा-१२४)

२) संबोधन जरी, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला आहे, परंतु संबोधित पूर्ण उम्मत आहे. म्हणजे तिलावतच्या प्रारंभात, ''अअ्‌जुबिल्लाहि बिन्‌श्‌शैतान्‌ निर्रजीम.'' म्हटले जावे.

३) म्हणजे एक हुकूम रद्द करून, त्याच्या जागी दुसरा हुकूम, अवतरीत करतो. ज्याचे प्रयोजन, अल्लाहतआला खूप जाणतो; आणि त्याच्याप्रमाणे तो आदेशांत फेरबदल करतो, तेव्हा काफिर म्हणतात की, हे कलाम, हे मुहम्मद ! (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) हे तुझे आपले रचलेले आहे; कारण की, अल्लाहतआला तर अशा प्रकारे करू शकत नाही. अल्लाहतआलाने फर्माविले, यांच्यातील बहुतेक लोक अज्ञानी आहेत. म्हणून हे रद्द करण्याचे प्रयोजन, काय जाणतील ? (आणखी स्पष्टीकरणासाठी पहावे, सू. बकर: आ. १०६ चा समास)

قُلْ نَزَّلَهُ رُوحُ الْقُدُسِ مِن رَّبِّكَ بِالْحَقِّ لِيُثَبِّتَ
الَّذِينَ آمَنُوا وَهُدًى وَبُشْرَىٰ لِلْمُسْلِمِينَ ﴿١٠٢﴾

(आपण) सांगून टाका की, त्याला आपल्या पालनकर्त्याकडून, जिब्रईल सत्त्यासह घेऊन आले आहेत. [१] कारण की, ईमानवाल्यांना, अल्लाहतआलाने दृढ जमवून टाकावे. [२] आणि मुसलमानांना मार्गदर्शन आणि शुभवर्तमान द्यावे. [३] (१०२)

وَلَقَدْ نَعْلَمُ أَنَّهُمْ يَقُولُونَ إِنَّمَا يُعَلِّمُهُ بَشَرٌ ۗ
لِّسَانُ الَّذِي يُلْحِدُونَ إِلَيْهِ أَعْجَمِيٌّ وَهَٰذَا
لِسَانٌ عَرَبِيٌّ مُّبِينٌ ﴿١٠٣﴾

आम्हास चांगल्याप्रकारे ठाऊक आहे की, हे काफिर म्हणतात की, त्याला तर एक माणूस शिकवितो; [४] त्याची भाषा, ज्याच्याकडे हे संबंध जोडत आहेत, तर गैरअरबी आहे; आणि कुरआन तर स्वच्छ अरबी भाषेत आहे. [५] (१०३)

إِنَّ الَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِآيَاتِ اللَّهِ لَا يَهْدِيهِمُ
اللَّهُ وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١٠٤﴾

नि:संशय जे लोक अल्लाहच्या महावाक्यांवर ईमान ठेवीत नाही; त्यांना अल्लाहकडून सुद्धा, मार्गदर्शन होत नाही; आणि त्यांच्याकरीता दु:खदायक शिक्षा आहे. (१०४)

إِنَّمَا يَفْتَرِي الْكَذِبَ الَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ
بِآيَاتِ اللَّهِ ۖ وَأُولَٰئِكَ هُمُ الْكَاذِبُونَ ﴿١٠٥﴾

नि:संशय खोटे कुभांडतर तेच रचतात, ज्यांचे अल्लाहतआलाच्या महावाक्यांवर ईमान नसते; हेच लोक लबाड आहेत. [६] (१०५)

مَن كَفَرَ بِاللَّهِ مِن بَعْدِ إِيمَانِهِ إِلَّا مَنْ أُكْرِهَ
وَقَلْبُهُ مُطْمَئِنٌّ بِالْإِيمَانِ وَلَٰكِن مَّن شَرَحَ
بِالْكُفْرِ صَدْرًا فَعَلَيْهِمْ غَضَبٌ مِّنَ اللَّهِ وَلَهُمْ
عَذَابٌ عَظِيمٌ ﴿١٠٦﴾

जो मनुष्य आपल्या ईमानानंतर, अल्लाहशी कुफ्र करेल, त्याच्याशिवाय की ज्याच्यावर, सक्ती केली जाईल, आणि त्याचे अंत:करण ईमानावर कायम असेल; [७] परंतु जो कोणी, खुल्या अंत:करणाने कुफ्र करेल, तर अशा (लोकां) वर अल्लाहचा प्रकोप आहे, आणि त्यांच्याच करता फार मोठी शिक्षा आहे. [८] (१०६)

ذَٰلِكَ بِأَنَّهُمُ اسْتَحَبُّوا الْحَيَاةَ الدُّنْيَا عَلَى الْآخِرَةِ
وَأَنَّ اللَّهَ لَا يَهْدِي الْقَوْمَ الْكَافِرِينَ ﴿١٠٧﴾

हे यासाठी की त्यांनी ऐहिक जीवनाला, परलोकापेक्षा जास्त प्रिय ठेवले आहे; खचित्च अल्लाहतआला काफिर लोकांना सरळमार्ग दाखवित नसतो. [९] (१०७)

أُولَٰئِكَ الَّذِينَ طَبَعَ اللَّهُ عَلَىٰ قُلُوبِهِمْ وَسَمْعِهِمْ
وَأَبْصَارِهِمْ ۖ وَأُولَٰئِكَ هُمُ الْغَافِلُونَ ﴿١٠٨﴾

हे ते लोक आहेत ज्यांच्या अंत:करणावर आणि ज्यांच्या कानावर आणि ज्यांच्या डोळ्यांवर, अल्लाहने मोहोर लावून टाकली आहे, आणि हेच लोक गाफील आहेत [१०] (१०८)

لَا جَرَمَ أَنَّهُمْ فِي الْآخِرَةِ هُمُ الْخَاسِرُونَ ﴿١٠٩﴾

यांत काही शंका नाही की हेच लोक परलोकांत फारच नुकसान उचलणारे आहेत (१०९)

ثُمَّ إِنَّ رَبَّكَ لِلَّذِينَ هَاجَرُوا مِن بَعْدِ مَا فُتِنُوا ثُمَّ
جَاهَدُوا وَصَبَرُوا إِنَّ رَبَّكَ مِن بَعْدِهَا لَغَفُورٌ
رَّحِيمٌ ﴿١١٠﴾ ع

१४ १५ २०

मग ज्या लोकांनी अजमाईशमध्ये टाकले गेल्यानंतर हिजरत (स्वदेश त्याग) केली; मग जिहाद (धर्मयुद्ध) केले. आणि सहनशिलतेचा पुरावा दिला. नि:संशय तुझा पालनकर्ता, या गोष्टीनंतर, त्यांना, क्षमाकर्ता आणि दयाळू आहे [११] (११०)

१) म्हणजे हे कुरआन, मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे, आपले रचलेले नाही. किंबहुना त्याला ह.जिब्रईल عليه السلام सारख्या, पवित्र देवदुताने, सत्त्यासह, पालनकर्त्याकडून, उतारले आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी आहे, ''त्याला विश्वसनीय आत्म्याने (जिब्रईल ने) तुझ्या अंत:करणावर उतारले आहे.'' (सू. शुअरा १९३ – १९४)

२) यासाठी की ते म्हणतात की, रद्द करणारी आणि रद्द केलेली, दोन्ही पालनकर्त्याकडून आहेत. याशिवाय रद्दचे प्रयोजन पण जेव्हा त्यांच्यासमोर येते, तर त्यांच्यात आणखी दृढता आणि ईमानांत मजबुती निर्माण होते.

३) आणि हे कुरआन मुसलमानांकरीता हिदायत आणि शुभवार्ताचे साधन आहे. कारण की, कुरआन पण पावसाप्रमाणे आहे. ज्याच्याने काही जमिनी खूप पिकतात; काहींमध्ये काटेरी झुडपांशिवाय काहीही उगत नाही.

ईमानवाल्यांचे मन पवित्र आणि स्वच्छ आहे. जे कुरआनाच्या बरकतीने, आणि ईमानाच्या नूरने, प्रकाशमय होऊन जाते. आणि काफिराचे मन, खडकाळ व रेताड जमिनीसारखे आहे, जे कुफ्र आणि अज्ञानाच्या अंध:काराने भरले आहे. जेथे कुरआनाची प्रकाश किरणे, पण काही परिणाम करत नाहीत.

४) काही गुलाम होते, जे तौरात आणि इंजीलशी परिचीत होते. पहिले ते ख्रिस्ती किंवा यहूदी होते; मग मुसलमान होऊन गेले. त्यांची भाषापण अशुद्ध होती; मक्केचे मुशरिक म्हणत की, अमुक गुलाम मुहम्मद ﷺ ला कुरआन शिकवितो.

५) अल्लाहतआलाने उत्तरांत सांगितले, हे ज्या माणसाचे किंवा माणसाचे नांव घेतात, ते तर अरबी भाषा पण शुद्धतेने बोलू शकत नाही. जेव्हा की कुरआन अशा स्वच्छ अरबी भाषेत आहे जे उत्तम वाणी, व भाषेत कमाल दर्जाला पोहचलेले, भाषाशैलीमध्ये अनुपम आहे. आणि आव्हान दिल्यानंतरसुद्धा, त्याच्या सारखा एक अध्यायपण बनवून सादर केला जाऊ शकत नाही. दुनियाभरचे साहित्यीक आणि विद्धान, याच्यासारखे तयार करून देण्यास असमर्थ आहेत. अरब त्या माणसाला अजमी (गुंगा) म्हणत; जो साहित्यीक आणि शुद्ध भाषा बोलण्याला असमर्थ असे. आणि अरबांशिवाय इतरांना पण अजमी म्हणण्यात येते की, अजमी भाषासुद्धा, उत्तम वाणी व भाषेत कमाल दर्जाला पोहचलेली, यांत अरबी भाषेचा मुकाबला करू शकत नाही.

६) आणि आमचा पैगंबर तर ईमानवाल्यांचा सरदार आणि त्यांचा कायद आहे. तो कशाप्रकारे अल्लाहवर कुभांड रचूंशकतो की, हे पुस्तक त्याच्यावर अल्लाहकडून अवतरीत झालेले नाही; आणि त्याने असेच सांगून टाकावे की, हे पुस्तक माझ्यावर अल्लाहकडून अवतरीत झालेले आहे. म्हणून आमचा पैगंबर खोटा नाही; ते स्वत:च लबाड आहेत; जे कुरआनाला अल्लाहकडून अवतरीत होण्याला नाकारणारे आहेत.

७) ज्ञानी लोकांचे या गोष्टीवर मतैक्य आहे की, ज्या मनुष्याला कुफ्र करण्यावर भाग पाडले जाईल, आणि तो जीव वांचवण्यासाठी, शाब्दिक किंवा कार्मिक, कुफ्र करून टाकेल जेव्हांकी त्याचे मन ईमानावर समाधानी असावे; तर तो काफिर होणार नाही. तसेच त्याची पत्नी पण त्याच्यापासून वेगळी होणार नाही. तसेच त्याच्यावर कुफ्रचे दुसरे आदेश लागूं होणार नाहीत. कालहल् कुरतुबी (फत्हुल कदीर)

८) ही धर्माकडून फिरून जाण्याची शिक्षा आहे की, तो अल्लाहच्या प्रकोपाला आणि मोठ्या शिक्षेला पात्र होईल. आणि याची ऐहिक शिक्षा, वध करणे आहे; जसे की हदीसमध्ये आहे. (आणखी तपशिलासाठी पहावे, सू.बकर: आ.२१७ आणि आ.२५६चा समास)

९) हे ईमान आणल्या नंतर, कुफ्रचा अंगिकारण्या (धर्माकडून फिरून जाणे.) ची सबब आहे की, एक तर त्यांना हे जग प्रिय आहे. दुसरे, हे अल्लाहजवळ हिदायतच्या योग्यच नाही.

१०) बस! हे उपदेशाच्या गोष्टी न ऐकतात आणि न समझतात. आणि न त्या निशाण्या पाहतात ज्या त्यांना सत्य मार्गाकडे नेणारी आहेत. तथापि हे अशा गफलतीत व्यस्त आहेत, ज्याने मार्गदर्शनाचे वाटा त्यांच्यासाठी बंद करुन दिल्या आहेत.

११) हे मक्केच्या त्या मुसलमानांचे वर्णन आहे, जे कमजोर होते. आणि इस्लाम कबूल केल्याच्या कारणाने काफिरांच्या जुल्म व अत्याचाराचे बली ठरले. परिणामत:त्यांना देशत्यागाचा हुकूम देण्यात आला. तर आपले नातेवाईक, देश आणि धन व संपत्ती सर्व सोडून इथोपिया किंवा मदीनेला चालले गेले. मग जेव्हा काफिराबरोबर लढाईची वेळ आली तर बहादुरीने लढले. आणि जेहादमध्ये भरपूर भाग घेतला. आणि त्याच्या मार्गाची सक्ती आणि कठीणाईला धैर्याने सहन केले. या सर्व गोष्टींनंतर निश्चित तुझा अल्लाह त्यांच्यासाठी क्षमा करणारा आणि दयाळू आहे. म्हणजे अल्लाहच्या क्षमा आणि रहमतच्या प्राप्तीसाठी ईमान आणि पुण्यकर्म करणे आवश्यक आहे. जसे की उल्लेखित देशत्यागींनी ईमान आणि कर्माचा उत्कृष्ट नमुना सादर केला. तर अल्लाहच्या क्षमा आणि रहमत चे पात्र झाले. रजीऊल्लाहु अन्हुम व रजी अनहो!

يَوۡمَ تَاۡتِىۡ كُلُّ نَفۡسٍ تُجَادِلُ عَنۡ نَّفۡسِهَا وَتُوَفّٰى كُلُّ نَفۡسٍ مَّا عَمِلَتۡ وَهُمۡ لَا يُظۡلَمُوۡنَ ﴿١١١﴾

**ज्या दिवशी प्रत्येक मनुष्य आपल्यासाठी लढत झगडत येईल;[१] आणि प्रत्येक माणसाला त्याच्या केलेल्या कर्मांचा पुरा पुरा बदला देण्यात येईल. आणि लोकांवर किंचित सुद्धा जुलूम केला जाणार नाही[२] (१११)**

وَضَرَبَ اللّٰهُ مَثَلًا قَرۡيَةً كَانَتۡ اٰمِنَةً مُّطۡمَٮِٕنَّةً يَّاۡتِيۡهَا رِزۡقُهَا رَغَدًا مِّنۡ كُلِّ مَكَانٍ فَكَفَرَتۡ بِاَنۡعُمِ اللّٰهِ فَاَذَاقَهَا اللّٰهُ لِبَاسَ الۡجُـوۡعِ وَالۡخَـوۡفِ بِمَا كَانُوۡا يَصۡنَعُوۡنَ ﴿١١٢﴾

**आणि अल्लाहतआला त्या वस्तीचे उदाहरण देतो, जी पूर्ण सुखशांती आणि समाधानाने होती. तिची उपजिविका तिच्याजवळ, सहजरित्या प्रत्येक ठिकाणाहून चालली येत असे. मग तिने अल्लाहतआलाच्या देणग्यांप्रती कृतघ्नता दर्शविली; तेव्हा अल्लाहतआलाने तिला भूक आणि भयाची गोडी चाखविली; जो बदला होता त्यांच्या कर्तृत्वाचा[३] (११२)**

وَلَقَدۡ جَآءَهُمۡ رَسُوۡلٌ مِّنۡهُمۡ فَكَذَّبُوۡهُ فَاَخَذَهُمُ الۡعَذَابُ وَهُمۡ ظٰلِمُوۡنَ ﴿١١٣﴾

**आणि त्यांच्याजवळ त्यांच्यातूनच (एक) पैगंबर पोहचला; तरी सुद्धा त्यांनी त्याला खोटे ठरविले; मग त्यांना शिक्षेने येऊन घेरले;[४] आणि ते होते ही, जालिम (११३)**

فَكُلُوۡا مِمَّا رَزَقَكُمُ اللّٰهُ حَلٰلًا طَيِّبًا ۖ وَّاشۡكُرُوۡا نِعۡمَتَ اللّٰهِ اِنۡ كُنۡتُمۡ اِيَّاهُ تَعۡبُدُوۡنَ ﴿١١٤﴾

**जी काही हलाल आणि शुद्ध रोजी, तुम्हास देऊन ठेवली आहे, तिला खा; आणि अल्लाहच्या देणगीचे आभार,माना, जर तुम्ही त्याची उपासना करीत असाल,[५] (११४)**

اِنَّمَا حَرَّمَ عَلَيۡكُمُ الۡمَيۡتَةَ وَالدَّمَ وَلَحۡمَ الۡخِنۡزِيۡرِ وَمَاۤ اُهِلَّ لِغَيۡرِ اللّٰهِ بِهٖ ۚ فَمَنِ اضۡطُرَّ غَيۡرَ بَاغٍ وَّلَا عَادٍ فَاِنَّ اللّٰهَ غَفُوۡرٌ رَّحِيۡمٌ ﴿١١٥﴾

**तुमच्यावर फक्त मुर्दाड, आणि रक्त आणि डुकराचे मांस, आणि ज्या वस्तुंवर अल्लाहच्या शिवाय, दुसऱ्याचे नांव घेतले जाईल, हराम आहेत.[६] जर कोणी मनुष्य लाचार केला जाईल, न तो इच्छा बाळगणारा असेल, न मर्यादेच्या बाहेर जाणारा असेल, तर खचित्‌च अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (११५)**

१) म्हणजे आणखी कोणी कोणाच्या समर्थनासाठी पुढे येणार नाही. न वडील, न भाऊ, न मुलगा न आणखी कोणी. तथापि, एकमेकापासून दूर पळतील. भाऊ भावापासून मुले आई वडिलांपासून, पती पत्नीपासून दूर पळेल. प्रत्येक व्यक्तिला फक्त आपलीच चिंता असेल, जी त्याला दुसऱ्यांपासून निष्काळजी करुन देईन. ''यांच्यातून प्रत्येकास त्या दिवशी एक अशी व्यस्तता घेरून असेल. जी त्यास व्यस्त ठेवण्यास पूरेशी असेल.'' (सू. अबस-३७)

२) म्हणजे पुण्याच्या प्रतिफळात कमी केली जावी. आणि वाईटाच्या बदल्यात (शिला) अधिकता करून दिली जावी, असे हेणार नाही. कोणावर थोडासाही अन्याय (जुल्म) होणार नाही. वाईटाचा तेवढाच बदला (सिला) मिळेल, जेवढा कोण्या वाईटाचा असेल. तथापि, पुण्याचे प्रतिफळ अल्लाह खूप वाढवून देईल. जे कयामतच्या दिवशी फक्त ईमानवाल्यांसाठी असेल. (अल्लाहतआला आम्हाला यांच्यात शामील करो. आमीन)

३) अधिकतर भाष्यकारांनी या 'वस्ती' ने अभिप्रेत 'मक्का' घेतले आहे. म्हणजे यात मक्का आणि मक्का वासियांचा हाल वर्णन करण्यात आला आहे. आणि हे त्यावेळी घडले जेव्हा अल्लाहच्या रसूल नी त्यांना शाप दिला. ''हे अल्लाह मुज़र (कबिला) वर आपली सक्त पकड कर आणि त्यांच्यावर अशा प्रकारे दु:ष्काळ धाड जसा ह. यूसुफ عليه السلام च्या जमान्यात मिस्त्रमध्ये दु:ष्काळ झाला होता.'' तथापि अल्लाहतआलाने मक्केच्या शांततेला भयाने आणि सुकाळाला दु:ष्काळात परिवर्तीत करुन दिले. येथपावेतो, की त्यांच्यावर ही वेळ आली की त्यांनी हाडे व वृक्षांची पाने खाऊन गुजराण करावी लागली. आणि काही भाष्यकारांजवळ ही अनिश्चित वस्ती आहे. आणि उदाहरणा दाखल ही गोष्ट वर्णन करण्यात आली आहे की, नेअमतला नाकारणाऱ्या लोकांची ही अवस्था असेल, ते कुठेही असोत किंवा कधीही असो.

४) ह्या शिक्षेने अभिप्रेत तीच शिक्षा म्हणजे भय आणि दु:ष्काळ होय. ज्याचा उल्लेख यापूर्वीच्या महावाक्यात येऊन चुकला आहे. किंवा याच्याने अभिप्रेत काफिरांचा तो कत्ल आहे, जो बद्रच्या युध्दात मुसलमानांच्या हातून झाले होते.

५) याचा अर्थ झाला की हलाल आणि पवित्र वसुंना वगळून हराम आणि अपवित्र उपयोग आणि अल्लाहला सोडून कोण्या दुसऱ्याची उपासना करणे, हे अल्लाहच्या देणग्यांप्रति अकृतज्ञताआहेत याचप्रमाणे हराम कारोबारचा अवलंब करणे देखील अल्लाहच्या देणग्यांप्रति अकृतज्ञता आहे. याव्यतिरिक्त अल्लाहवर भरोसा न असण्याचे प्रतिक आहे. (अल्लाहतआला आमचे यापासून संरक्षण करो)

६) हे महावाक्य याच्यापूर्वी तीन वेळांपण येऊंन चुकले आहे. सू.बकर: १७३, सू. माईद: ३, सू. अन्आम – १४५ मध्ये. हे चौथे ठिकाण आहे, जेथे येथे अल्लाहने याला पुन्हा वर्णन केले आहे. ज्याने हे स्पष्ट आहे की, या महावाक्यांत चार हराम वस्तूंचा उल्लेख आहे. अल्लाहतआला, त्यांच्यापासून, मुसलमानांना, सक्त ताकीद देऊन वाचवू इच्छितो. याचा आवश्यक खुलासा, मागे येऊन गेलेल्या ठिकाणांवर, येऊन चुकला आहे. तथापि याच्यांत, ''ज्या वस्तुंवर अल्लाहच्या शिवाय, दुसऱ्यांचे नांव घेतले जाईल'' हा जो चवथा प्रकार आहे; याच्या भावार्थांत, बारीक आणि मनमाने फेरबदल, आणि ओढून ताणून, बहाणे करून, काम घेण्यांत येऊन, शिर्कसाठी चोर दरवाज्याचा शोध घेण्यांत येतो. म्हणून याचा आणखी खुलासा सादर आहे.

जे जनावर अल्लाहशिवाय इतरांसाठी, नामजद केले जाईल; त्याचे वेगवेगळे प्रकार आहेत. एक प्रकार हा आहे की, गैरूल्लाहचे सामीप्य, आणि त्याच्या प्रसन्नतेसाठी, त्याला जबाह केले जावे; आणि जबाह करतांनापण नांव पण त्याच मुर्ती किंवा बुजुर्गाचे घेतले जावे ज्याला प्रसन्न करून घेण्याचा उद्देश्य असावा. दुसरे स्वरूप हे आहे की, उद्देश्य तर गैरुल्लाहचेच सामिप्य असावे, परंतु जबाह अल्लाहच्या नांवावर केले जावे. ज्याप्रमाणे कबर पुजकांमध्ये हे काम सर्रास होते. ते जनावरांना तर बुजुर्गांकरीता नामजद तर करतात; उदाहरणार्थ, हा बोकड अमक्या पिराचा आहे. ही गाय ढमक्या पिराची आहे. हे जनावर ग्यारावी करीतां, म्हणजे शेख अ. कादिर जिलानी करीतांआहे. वगैरे वगैरे. आणि त्यांना हे बिस्मिल्लाह म्हणून जबा करतात. यासाठी ते म्हणतात की पहले स्वरूप तर खचित्च हराम आहे; परंतु हे दुसरे स्वरूप हराम नाही. किंबहुना योग्य (जाएज) आहे. कारण की, ते गैरूल्लाहच्या नांवावर जबाह केले गेले नाही. आणि अशाप्रकारे शिर्कचा मार्ग खुला करून देण्यांत आला आहे. वास्तविक धर्म शास्त्रीयांनी या दुसऱ्या स्वरूपाला सुद्धा हराम ठरवून टाकले आहे. यासाठी हे सुद्धा, !मा उहिल्ललिगयारिल्लाह् बिही' मध्ये दाखल आहे. म्हणून बैजावीच्या समासांत आहे, ''प्रत्येक ते जनावर ज्यावर गैरूल्लाहचे नांव घेतले जाईल, हराम आहे; जरी जबाह करतेवेळी, त्याच्यावर अल्लाहचेच नांव घेतले गेले असेल. यासाठी की, धर्मपंडीतांचे मतैक्य आहे की, कोणी मुसलमान गैरूल्लाहचे सामीप्य प्राप्त करण्यासाठी जनावर जबाह करील तर तो मुरतद (धर्माकडून फिरुन जाणे) होऊन जाईल. आणि त्याचे जबाह केलेले, (जबीहा) मुरतदचे जबाह केलेले असेल. आणि फिका हनफीचे प्रसिद्ध पुस्तक 'दुर्रे मुखतार' मध्ये आहे, ''कोणी अधिकारी, आणि अशाच प्रकारे, कोण्या मोठ्या व्यक्तीच्या आगमनावर,शास्त्रीय पाहुणचाराच्या इरादाला सोडून त्याच्या सन्मानार्थ जनावर जबाह केले गेले तर ते हराम आहे; यासाठी की ते,''उहिल्ल लि गयरिल्लाह'' मध्ये दाखल आहे; जरी त्याच्यावर अल्लाहचेच नाव घेतले गेले असेल. आणि अल्लामा शामीने याचे समर्थन केले आहे.'' (किताबुल जबाह, तबअ कदीम १२७७ हि पृ.२७७ फतवा शामी जि.५ पृ.२०३, मुतबअ मयमनिया (जिप्त) अलबत्ता काही धर्मशास्त्री (फुकहा) या दुसऱ्या स्वरूपाला, 'मा उहिल्ल लि गय्रिल्लाह्' चा दलील दिला गेलेला आणि यांत शामील समजत नाही; आणि गैरूल्लाहच्या सामीप्याच्या कारणाने त्याला हराम समजतात. जणू हराम होण्यांत कुठलाही मतभेद नाही. फक्त दलील (पुरावा) आणि त्यावर विचार करण्याच्या पद्धती, यामध्ये मतभेद आहेत. याशिवाय, हे दुसरे स्वरूप, वमा जुबीहा अलन नुसुबि' (जी मुर्तीजवळ किंवा ठाण्यांवर जबाह केले जाईल) मध्ये पण दाखल आहे. ज्याला सू.माईद: मध्ये हराम केलेल्यांत वर्णन केले आहे. आणि हदिर्शीनी ठाऊक होते की, चौकटी किंवा दरवाज्यांवर, दरबारांमध्ये, आणि ठाण्यांवर जबाह केलेली जनावरे, हराम आहेत. यासाठी की तेथे जबाह करण्याचा, किंवा तेथे नेऊन वाटण्याचा, उद्देश, अल्लाहच्याशिवाय दुसऱ्यांना प्रसन्न आणि त्यांचे सामिप्य प्राप्त करण्यासाठीच, असतो. एका हदीसमध्ये आहे, ''एका माणसाने येऊन, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला म्हटले, की नवस केला आहे की, मी निर्जन जागी उंट जबाह करीन; आपण सल्ल. नी विचारले की काय अज्ञान काळांत, त्या जागी, कोण्या मुर्तीतून, कोणी मुर्ती होती, जीची पुजा अर्चा केली जात होती? लोकांनी सांगितले, नाही! मग आपण विचारले, की तेथे त्यांच्या सणांमधून, कोणी सण तर साजरा केला जात नव्हता? लोकांनी याला पण नकार दिला. तेव्हा आपण प्रश्न करणाऱ्याला, नवस पूर्ण करण्याचा हुकूम दिला. (अबुदाऊद) याच्याने ठाऊक झाले की, मुर्तीच्या हटवून दिल्यानंतर सुद्धां, निर्जन स्थळांवर जाऊन, जनावर जबाह करणे जाएज (योग्य) नाही. तर त्या चौखटी आणि दरवाजांवर जाऊन, जबाह केले जावे जे पुजाअर्चा करणे आणि नवस फेडण्यांसाठी लोकांचे सार्वजनिक स्थळ आहे. हे एकदम हराम आहे. अअ्जनाल्लाह् मिनहु!

وَلَا تَقُولُوا لِمَا تَصِفُ أَلْسِنَتُكُمُ الْكَذِبَ هَٰذَا حَلَالٌ وَهَٰذَا حَرَامٌ لِّتَفْتَرُوا عَلَى اللَّهِ الْكَذِبَ ۚ إِنَّ الَّذِينَ يَفْتَرُونَ عَلَى اللَّهِ الْكَذِبَ لَا يُفْلِحُونَ ﴿١١٦﴾

**आणि कोण्या वस्तुला आपल्या तोंडाने, खोटे खोटे सांगू नका की ही हलाल आहे आणि ती हराम आहे. की अल्लाहतआलावर खोटे कुभांड रचावे. (१) लक्षांत ठेवा की, अल्लाहतआलावर खोटा आळ घेणारे, यशस्वी होण्यापासून वंचित्‌च राहतात (١١٦)**

مَتَاعٌ قَلِيلٌ وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١١٧﴾

**त्यांना फारच मामुली फायदा मिळतो; आणि त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा आहे. (١١٧)**

وَعَلَى الَّذِينَ هَادُوا حَرَّمْنَا مَا قَصَصْنَا عَلَيْكَ مِن قَبْلُ ۖ وَمَا ظَلَمْنَاهُمْ وَلَٰكِن كَانُوا أَنفُسَهُمْ يَظْلِمُونَ ﴿١١٨﴾

**आणि यहूद्यांवर आम्ही जे काही हराम केले होते; त्याला आम्ही पूर्वीच तुम्हास ऐकवून चुकलो आहोत. (२) आम्ही त्यांच्यावर जुलूम केला नाही; किंबहुना स्वत: तेच आपल्या जिवांवर जुलूम करीत राहिले. (١١٨)**

ثُمَّ إِنَّ رَبَّكَ لِلَّذِينَ عَمِلُوا السُّوءَ بِجَهَالَةٍ ثُمَّ تَابُوا مِن بَعْدِ ذَٰلِكَ وَأَصْلَحُوا إِنَّ رَبَّكَ مِن بَعْدِهَا لَغَفُورٌ رَّحِيمٌ ﴿١١٩﴾

**मग जो कोणी अज्ञानामुळे, वाईट कृत्य करून घेईल, मग तौबा करेल, आणि (आपल्यात) सुधारणापण करून घेईल; तर मग तुमचा पालनकर्ता, कुठल्याही शंका कुशंकेशिवाय, मोठा क्षमाकर्ता आणि फारच दयाळू आहे. (١١٩)**

إِنَّ إِبْرَاهِيمَ كَانَ أُمَّةً قَانِتًا لِّلَّهِ حَنِيفًا وَلَمْ يَكُ مِنَ الْمُشْرِكِينَ ﴿١٢٠﴾

**नि:संशय इब्राहीम एक पेशवा (३) आणि अल्लाहतआलाचे आज्ञाधारक आणि एकनिष्ठ होते; आणि ते मुशरिकांमधून नव्हते. (١٢٠)**

شَاكِرًا لِّأَنْعُمِهِ ۚ اجْتَبَاهُ وَهَدَاهُ إِلَىٰ صِرَاطٍ مُّسْتَقِيمٍ ﴿١٢١﴾

**अल्लाहतआलाच्या देणग्यांप्रति, आभार मानणारे होते, अल्लाहने त्यांना निवडून घेतले होते; आणि त्यांना सरळ मार्ग समजाऊन दिला होता (١٢١)**

وَآتَيْنَاهُ فِي الدُّنْيَا حَسَنَةً ۖ وَإِنَّهُ فِي الْآخِرَةِ لَمِنَ الصَّالِحِينَ ﴿١٢٢﴾

**आणि आम्ही त्याला या जगातपण श्रेय दिले होते; आणि नि:संशय ते परलोकांत पण, सदाचरणी लोकांमधून आहे. (١٢٢)**

ثُمَّ أَوْحَيْنَا إِلَيْكَ أَنِ اتَّبِعْ مِلَّةَ إِبْرَاهِيمَ حَنِيفًا ۖ وَمَا كَانَ مِنَ الْمُشْرِكِينَ ﴿١٢٣﴾

**मग आम्ही आपल्याकडे वह्य केले की, तुम्ही इब्राहीम, जे एकनिष्ठ होते, त्यांचे अनुकरण करा; (४) जे मुशरिकांपैकी नव्हते. (١٢٣)**

१) हा इशारा आहे त्या जनावरांकडे, जे मुर्तींच्या नावावर ठरवून, त्यांना आपल्यासाठी हराम करुन घेत असत. जसे बहीरा, साईबा, वसिला आणि हाम, वगैरे (पहा सू. माईद: १०३ आणि सू. अन्‌आम १३९-१४१ चे समास)

२) पहा सू.अन्‌आम-१४६ चा समास, तसेच सू.निसा-१६० मध्ये सुद्धा त्याचा उल्लेख आहे.

३) उम्मतचा अर्थ मार्गदर्शक किंवा कायद चे पण आहेत; जसे की, भाषांत्तराने स्पष्ट आहे. आणि उम्मत, उम्मतच्या अर्थांत पण आहे. या अनुषंगाने ह.इब्राहीम عليه السلام चे अस्तित्व एका उम्मत बरोबर होते. (उम्मतच्य अर्थासाठी, सू.हूद - ८ चा समास पहावा.)

४) मिल्लतचा अर्थ आहे, असा धर्म, ज्याला अल्लाहतआलाने, आपल्या कोण्या पैगंबरामार्फत, लोकांसाठी योग्य आणि आवश्यक ठरविला आहे. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, अशी गोष्ट असून सुद्धा की, आपण सर्व पैगंबरांसमवेत, आदमच्या संततीचे सरदार आहेत; आपणांस इब्राहीमी धर्माच्या अनुकरणाचा हुकूम देण्यांत आला आहे. ज्यांत ह.इब्राहीम عليه السلام चे वेगळे आणि विशेष श्रेष्ठत्व, सिद्ध होते. तशी तत्त्वाच्या दृष्टीकोनांतून, तमाम पैगंबरांचे (धर्म) शास्त्र आणि धर्म, एकच राहिला आहे; ज्याच्यात पैगंबरी बरोबर, एकेश्वरवाद आणि परतून जाण्याचे ठिकाणाला पाया स्थिती प्राप्त आहे.

إِنَّمَا جُعِلَ السَّبْتُ عَلَى الَّذِينَ اخْتَلَفُوا فِيهِ ۚ وَإِنَّ رَبَّكَ لَيَحْكُمُ بَيْنَهُمْ يَوْمَ الْقِيَامَةِ فِيمَا كَانُوا فِيهِ يَخْتَلِفُونَ ﴿١٢٤﴾

शनिवारच्या दिवसाचा आदर सन्मान, त्याच लोकांच्या ठाई आवश्यक, करण्यात आला होता, ज्यांनी त्याच्यात मतभेद केला होता; गोष्ट अशी [१] आहे की, तुमचा पालनकर्ता, स्वत:च त्यांच्यातील मतभेदाचा फैसला कयामतच्या दिवशी करेल (१२४)

ادْعُ إِلَىٰ سَبِيلِ رَبِّكَ بِالْحِكْمَةِ وَالْمَوْعِظَةِ الْحَسَنَةِ ۖ وَجَادِلْهُم بِالَّتِي هِيَ أَحْسَنُ ۚ إِنَّ رَبَّكَ هُوَ أَعْلَمُ بِمَن ضَلَّ عَن سَبِيلِهِ ۖ وَهُوَ أَعْلَمُ بِالْمُهْتَدِينَ ﴿١٢٥﴾

आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे, लोकांना अल्लाहचे हिक्मत आणि सदुपदेशासह, बोलवा; आणि त्यांच्याशी चांगल्या पद्धतीने, संभाषण करा. [२] खचित्‌च, आपल्या पालनकर्ता आपल्या मार्गाहून, बहकणाऱ्यांनापण चांगल्याप्रकारे जाणतो; आणि तो मार्ग पावलेल्या लोकांशी सुद्धा चांगल्याप्रकारे वाकबगार आहे. [३] (१२५)

وَإِنْ عَاقَبْتُمْ فَعَاقِبُوا بِمِثْلِ مَا عُوقِبْتُم بِهِ ۖ وَلَئِن صَبَرْتُمْ لَهُوَ خَيْرٌ لِّلصَّابِرِينَ ﴿١٢٦﴾

आणि जर बदला घ्यालच, तर बिल्कुल तेवढाच घ्या; जेवढे दु:ख तुम्हांस पोहचविले गेले असेल. आणि जर सहन कराल, तर नि:संशय सहन करणाऱ्यांसाठी, उत्तमांत उत्तम आहे. [४] (१२६)

وَاصْبِرْ وَمَا صَبْرُكَ إِلَّا بِاللَّهِ ۚ وَلَا تَحْزَنْ عَلَيْهِمْ وَلَا تَكُ فِي ضَيْقٍ مِّمَّا يَمْكُرُونَ ﴿١٢٧﴾

आपण सहनशिलता पत्करा, अल्लाहने सुबुद्धी दिल्याशिवाय, आपण सहन करूच शकत नाही. आणि त्यांच्या स्थितीवर दु:ख करू नका; आणि जे मक्र करत असतात, त्यापासून मनांत संकुचित होऊ नका. [५] (१२७)

إِنَّ اللَّهَ مَعَ الَّذِينَ اتَّقَوا وَّالَّذِينَ هُم مُّحْسِنُونَ ﴿١٢٨﴾ ع ١٦/٩/٢٢

विश्वास ठेवा की, अल्लाहतआला, त्याला भिऊन वागणाऱ्यांचा आणि पूर्ण कर्म करणाऱ्यांचा साथीदार आहे. (१२८) १६/९/२२

१) या मतभेदाचे स्वरूप काय आहे? याच्या तपशिलांत मतभेद आहेत. काही म्हणतात की, ह.मूसा عليه السلام नी, त्यांच्यासाठी शुक्रवारचा दिवस ठरविला होता. परंतु बनु इस्त्राईलने याच्यात मतभेद केला; आणि शनिवारचा दिवस आदर सन्मान आणि उपासनेसाठी पसंत केला. अल्लाहतआलाने फर्माविले, ''मूसा त्यांनी जो दिवस पसंत केला आहे, तोच दिवस त्यांच्यासाठी राहूद्या.'' काही म्हणतात की, अल्लाहतआलाने त्यांना हुकूम दिला होता की आदर सन्मानासाठी आठवड्यांतून कोणी एक दिवस नक्की करून घ्या. ज्यामध्ये याच्यांत मतभेद झाला. मग यहूद्यांनी आपल्यांत खूप विचार विमर्श करून शनिवारचा दिवस आणि खिस्त्यांनी रविवारचा दिवस नक्की करून घेतला. आणि शुक्रवारच्या दिवसाला, अल्लाहतआलाने मुसलमानांकरीता खास करून दिला. आणि काही म्हणतात की, खिस्त्यांनी रविवारचा दिवस, यहूद्यांच्या विरोध करण्याच्या भावनेने, निश्चित केला होता. याचप्रमाणे उपासनेसाठी त्यांनी, आपल्याला यहूद्यांपासून वेगळे ठेवण्यासाठी, बैतुल मुकद्दसच्या एका मोठ्या दगडाच्या पूर्व बाजूला आपला किबला निश्चित केला. शुक्रवारचा दिवस अल्लाहकडून निश्चित केला जाण्याचा उल्लेख, हदीसमध्ये आढळून येतो. (कृपया पहावे स.बुखारी व स. मुस्लिम)

२) याच्यात प्रचार आणि आवाहनाची तत्त्वे सांगण्यांत आली आहेत. जी बुद्धीयुक्त, सदुपदेश आणि मैत्रीपूर्ण आणि नम्रतेवर, आधारित आहेत. भांडण तंटे, वाकडेपणा, कडक बोलणे, यापासून वांचत, नम्रतेने सहानभूतीपूर्वक वागणूक अंगिकारली पाहिजे.

३) म्हणजे आपले काम वर उल्लेख केलेल्या तत्त्वांप्रमाणे, उपदेश व प्रचार करणे आहे. हिदायतच्या मार्गावर चालवून देणे, हे फक्त अल्लाहच्या अखत्यारांत आहे. आणि तो जाणतो की, हिदायत कबूल करणारा कोण आहे आणि कोण नाही?

४) याच्यांत जरी बदला घेण्याची परवानगी आहे, या अटीवर की, मर्यादेच्या बाहेर न जावे, नाहीतर हाच स्वत: जालीम होऊन जाईल. तथापि क्षमा करून देणे, आणि सहनशिलता पत्करण्याला जास्त चांगले ठरविण्यांत आले आहे.

५) यासाठी की, अल्लाहतआला त्यांच्या मुकाबल्यात, ईमानवाले, ईशभय बाळगणारे, आणि सदाचरणी लोकांबरोबर आहे. आणि ज्याच्या बरोबर अल्लाह असेल, दुनियावाल्यांची कट कारस्थाने, नुकसान पोहचवू शकत नाही. जसे की याच्यानंतरच्या महावाक्यांत आहे.

# (१७) सू. बनी इस्त्राईल

महावाक्ये १११ — रुकूअ १२

(۱۷) سُوۡرَۃُ بَنِیۡۤ اِسۡرَآءِیۡلَ مَکِّیَّۃٌ (۵۰) — اٰیَاتُہَا ۱۱۱ — رُکُوۡعَاتُہَا ۱۲

بِسۡمِ اللّٰہِ الرَّحۡمٰنِ الرَّحِیۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

سُبۡحٰنَ الَّذِیۡۤ اَسۡرٰی بِعَبۡدِہٖ لَیۡلًا مِّنَ الۡمَسۡجِدِ الۡحَرَامِ اِلَی الۡمَسۡجِدِ الۡاَقۡصَا الَّذِیۡ بٰرَکۡنَا حَوۡلَہٗ لِنُرِیَہٗ مِنۡ اٰیٰتِنَا ؕ اِنَّہٗ ہُوَ السَّمِیۡعُ الۡبَصِیۡرُ ۝۱

पवित्र आहे तो[१] अल्लाहतआला, जो आपल्या बंद्याला[२], रातोरात, मसजीदे हरामपासून मस्जिदे अक्सापर्यंत घेऊन[३] गेला. जिच्या आसपास आम्ही बरकत देऊन ठेवली[४] आहे. यासाठी की, आम्ही त्याला आपल्या सामर्थ्याचे काही नमुने दाखवावेत[५]; खचित्च अल्लाहतआला खूप ऐकणारा आणि पाहणारा आहे. ①

وَ اٰتَیۡنَا مُوۡسَی الۡکِتٰبَ وَ جَعَلۡنٰہُ ہُدًی لِّبَنِیۡۤ اِسۡرَآءِیۡلَ اَلَّا تَتَّخِذُوۡا مِنۡ دُوۡنِیۡ وَکِیۡلًا ؕ ۝۲

आणि आम्ही मूसाला पुस्तक दिले; आणि त्याला बनी इस्राईलसाठी हिदायत बनविले; की तुम्ही माझ्याशिवाय कोणाला आपला कार्यसाधक बनवू नये. ②

ذُرِّیَّۃَ مَنۡ حَمَلۡنَا مَعَ نُوۡحٍ ؕ اِنَّہٗ کَانَ عَبۡدًا شَکُوۡرًا ۝۳

अहो त्या लोकांची संतती! ज्यांना आम्ही नूहच्या बरोबर (नावेत) चढवून घेतले होते; तो आमचा मोठा कृतज्ञ सेवक होता[६]. ③

وَ قَضَیۡنَاۤ اِلٰی بَنِیۡۤ اِسۡرَآءِیۡلَ فِی الۡکِتٰبِ لَتُفۡسِدُنَّ فِی الۡاَرۡضِ مَرَّتَیۡنِ وَ لَتَعۡلُنَّ عُلُوًّا کَبِیۡرًا ۝۴

आणि आम्ही बनु इस्राईल करिता; त्यांच्या पुस्तकात स्पष्ट निर्णय करून दिला होता, की तुम्ही मुलखात दोन वेळा फसाद कराल. आणि तुम्ही फार भयंकर अत्याचार कराल ④

فَاِذَا جَآءَ وَعۡدُ اُوۡلٰىہُمَا بَعَثۡنَا عَلَیۡکُمۡ عِبَادًا لَّنَاۤ اُولِیۡ بَاۡسٍ شَدِیۡدٍ فَجَاسُوۡا خِلٰلَ الدِّیَارِ ؕ وَ کَانَ وَعۡدًا مَّفۡعُوۡلًا ۝۵

या दोन वायद्यांमधून, पहिल्याला येताच, आम्ही तुमच्या मुकाबल्यात, आपल्या सेवकांना पाठवले. जे फारच लढवय्ये होते; मग ते तुमच्या घराच्या आंतपर्यंत घुसून गेले; आणि अल्लाहचा हा वायदा पूर्ण होणारच होता[७]. ⑤

ثُمَّ رَدَدۡنَا لَکُمُ الۡکَرَّۃَ عَلَیۡہِمۡ وَ اَمۡدَدۡنٰکُمۡ بِاَمۡوَالٍ وَّ بَنِیۡنَ وَ جَعَلۡنٰکُمۡ اَکۡثَرَ نَفِیۡرًا ۝۶

मग आम्ही त्यांच्यावर तुमचे वर्चस्व प्रस्थापित केले; आणि संपत्ती आणि संततीने तुमची मदत केली. आणि तुम्हास बहुसंख्यांक लोक करून दिले.[८] ⑥

اِنۡ اَحۡسَنۡتُمۡ اَحۡسَنۡتُمۡ لِاَنۡفُسِکُمۡ ۟ وَ اِنۡ اَسَاۡتُمۡ فَلَہَا ؕ فَاِذَا جَآءَ وَعۡدُ الۡاٰخِرَۃِ لِیَسُوۡٓءٗا وُجُوۡہَکُمۡ وَ لِیَدۡخُلُوا الۡمَسۡجِدَ کَمَا دَخَلُوۡہُ اَوَّلَ مَرَّۃٍ وَّ لِیُتَبِّرُوۡا مَا عَلَوۡا تَتۡبِیۡرًا ۝۷

जर तुम्ही चांगली कामे केलीत; तर आपल्याच फायद्यासाठी; आणि जर वाईट कामे केली, तरी सुद्धा आपल्याचसाठी. मग जेव्हा तो दुसरा वायदा येऊन पोहोचला (तर आम्ही दुसऱ्या सेवकांना पाठविले जेकि) तर ते तुमची तोंडे बिघडवून टाकतील; आणि पहिल्या वेळेसारखे, पुन्हा या मशिदीत घुसून जातील; आणि ज्या ज्या वस्तूवर आधिपत्य पावतील, तिला तोडून फोडून, मुळांतून उखडून टाकतील[९] ⑦

१) 'सुबहान' 'सब्बह' 'यसब्बहु' चा मसदर आहे अर्थ आहे. मी अल्लाहला प्रत्येक दोषापासून पवित्र, व ऐबपासून मुक्त आहे असे जाहीर करतो. सर्व साधारण याचा उपयोग अशा प्रसंगी होतो, जेव्हा कधी कोण्या महान घटनेचा उल्लेख असेल. अर्थ हा होतो की, लोकांच्या जवळ जाहीर साधन सामुग्रीच्या अनुषंगाने ही घटना किती सुद्धा अशक्य असो, अल्लाहच्या जवळ काही ही कठीण नाही. यासाठी की त्याला साधन सामुग्रीची आवश्यकता नाही. तो तर शब्द 'कुन' ने पापणी लवतांच, जे इच्छितो, ते करू शकतो. साधन सामुग्री तर मानवासाठी आहे. अल्लाहतआला या मर्यादा आणि कोताई पासून पवित्र आहे.

२) इसराचा अर्थ होतो रात्री घेऊन जाणे; पुढे 'लयलन्' यासाठी उल्लेख केला गेला आहे, यासाठी की, रात्रीचे लहान होणे स्पष्ट होऊन जावे; म्हणजे रात्रीच्या एका भागांत किंवा थोड्याशा भागांत म्हणजे चाळीस रात्रीचा हा दुरवरचा प्रवास, पूर्ण रात्रींत सुद्धा नाही; किंबहुना रात्रीच्या एका छोट्या भागांत पार पाडला.

३) 'अक्सा' दुरवरच्याला म्हणतात. बैतुल मुकद्दस जे अलकुदूस किंवा ईलिया (जुने नांव) शहरात आहे. आणि पॅलेस्टाईन मध्ये येते. मक्केहून अलकुदूस पर्यंत प्रवास ४० दिवसांचा आहे. या अनुषंगाने, मस्जिदे हरामच्या तुलनेत,

बैतुल मुकद्दसला, मस्जिदे अक्सा (दुरची मशिद) म्हणण्यात आले आहे.

४) हा इलाखा नैसर्गिक पाट व फळांच्या विपुलतेने आणि पैगंबर लोकाचे रहाण्याचे ठिकाण आणि दफन होण्याचे ठिकाण राहिल्याने श्रेष्ठ ठरला आहे. म्हणून त्याला बरकतवाला म्हणण्यांत आले आहे.

५) हा या सहलीचा उद्देश आहे. कारण की आम्ही आपल्या सेवकाला विचित्र गोष्टी आणि मोठमोठ्या निशाण्या दाखवाव्यात. ज्यांतून एक निशाणी आणि चमत्कार हा आहे की, एवढा मोठा प्रवास रात्रीच्या एका थोड्या प्रहारात होऊन गेला. नबी करीम ﷺ ला, जी मेअराज झाली, म्हणजे आकाशावर घेऊन जाण्यात आले, तेथे वेगवेगळ्या आकाशांवर, मागील पैगंबरांच्या गांठी भेटी झाल्यात आणि सिदरतुल मुन्तहावर, जो अर्शच्या खाली सातव्यांआकाशावर आहे, अल्लाहतआलाने 'वह्य' मार्फत नमाज आणि इतर गोष्टी प्रदान केल्यात. ज्याचा तपशिल सहीह हदीशींमध्ये वर्णन करण्यांत आला आहे. आणि सहाबा ﷺ आणि ताबेअीन رحمہم اللہ पासून आजपर्यंत, उम्मतचे सर्व धर्मपंडीत आणि धर्मशास्त्री, या गोष्टीला मान्य करीत आले आहेत की ही मेअराज, आपल्या शरीराबरोबर जागृतावस्थेत झाली आहे. हे स्वप्न किंवा ही आत्मिक सहल आणि स्वप्नात पहाणे नाही. किंबहुना प्रत्यक्ष डोळ्यांनी पहाणे आहे. जे अल्लाहने आपल्या परिपूर्ण सामर्थ्याने आपल्या पैगंबराला कळविले आहे. या मेअराजचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाला इसरा म्हणतात. ज्याचा उल्लेख येथे केला गेला आहे. आणि जे मसजिदे हरामपासून मसजिदे अक्सापर्यंतच्या प्रवासाचे नांव आहे. येथे पोहचल्यानंतर, नबी ﷺ नी तमाम पैगंबरांची इमामत केली. बैतुल मुकद्दसहून मग आपणांस, आकाशांवर घेऊन जाण्यांत आले. हा या प्रवासाचा दुसरा भाग आहे. ज्याला मेअराज म्हणतात. याची काही चर्चा सू.नजम मध्ये केली गेली आहे; आणि बाकी तपशिल हदिर्शींमध्ये सांगण्यात आला आहे. सर्व साधारणपणे या संपूर्ण प्रवासाला 'मेअराज' च म्हणण्यात येते. मेअराज शिडीला म्हणतात. हे नबी ﷺ च्या शुभ मुखाने निघालेले शब्द, 'उरीज बी इलस् समाओ' (मला आकाशावर घेऊन जाण्यांत आले किंवा चढविण्यांत आले.) ने जाहीर करण्यात आले. कारण की, या प्रवासाचा हा दुसरा भाग, पहिल्या भागापेक्षा जास्त महत्त्वाचा आणि शानदार आहे. यामुळेच मेअराजचा शब्दच जास्त मशहुर झाला. याच्या तारखेत मतभेद आहेत. तथापि हा प्रसंग हिजरतच्या पूर्वीचा आहे. यावर सर्वांचे एकमत आहे.कोणी रबीऊल अव्वलची १७ किंवा २७, कोणी रज्जब ची २७, आणि दुसरे काही, याचा आणखी काही महिना आणि तारीख सांगतात. (फत्हुल कदीर)

६) ह.नूह عليه السلام च्या काळात वादळ आणि प्रलयानंतर मानवी वंश, ह.नूह عليه السلام च्या त्या मुलांचा वंश आहे, जे नूह عليه السلام च्या नांवेत स्वार झाले होते. आणि वादळापासून वांचून गेले होते. म्हणून बनु इस्राईलला संबोधित करून सांगण्यांत आले की तुमचे पिता ह.नूह عليه السلام अल्लाहचे फार कृतज्ञ सेवक होते. तुम्ही सुद्धांआपल्या बापाप्रमाणे कृतज्ञतेचा मार्ग अनुसरा. आणि आम्ही जे मुहम्मद ﷺ ला पैगंबर बनवून पाठविले आहे, त्यांना नाकारून देणगीप्रत कृतघ्नता दाखवू नका.

७) हा इशारा आहे त्या फजिती आणि बर्बादीकडे, जे बाबिलचा सत्ताधीश बख्त नसरच्या हातांनी, मसीह عليه السلام च्या सुमारे सहाशे वर्षे पूर्वी, यहूद्यांवर जी येरूशलेम मध्ये झाली. त्याने कुठलाही विचार न करता, यहूद्यांना ठार केले; आणि एका मोठ्या संख्येला गुलाम केले. आणि हे त्यावेळी झाले, जेव्हा त्यांनी अल्लाहचे पैगंबर ह.शअया عليه السلام ला ठार केले. किंवा ह.उरमिया عليه السلام ला कैद केले; आणि तौरातच्या आदेशांच्या विरूद्ध, आणि अपराध करून, मुलखांत फिसाद करण्याचे अपराधी बनले. काही म्हणतात की बख्ते नसरच्या ऐवजी, जालूतला अल्लाहतआलाने शिक्षा म्हणून त्यांच्यावर लादले, ज्याने त्यांच्यावर अनन्वयीत अत्त्याचार व जुलुम केले; येथपावेतो की तालूतच्या अधिपत्याखाली, ह.दाऊद عليه السلام नी जालूतला ठार केले.(जसे की सू. बकर: महावाक्य २५१ मध्ये याचा उल्लेख केला आहे.)

८) म्हणजे बख्त नसर किंवा जालूतच्या वधानंतर, आम्ही तुम्हास पुन्हा, संपत्ती आणि धन, मुलगे आणि प्रतिष्ठा व दबदबा, प्रदान केला. जेव्हा की या साऱ्या वस्तू, तुमच्यापासून हिसकावून घेण्यांत आल्या होत्या. आणि मग तुम्हास जास्त संख्येचे आणि शक्तीशाली बनवून दिले.

९) हा दुसऱ्यादा त्यांनी फिसाद घडवून आणला. ह.जकरिया عليه السلام ला त्यांनी ठार केले. आणि ह.ईसा عليه السلام ला पण ठार करण्याच्या प्रयत्नांत राहिले; ज्यांना अल्लाहतआलाने जिवंत आकाशावर उचलून, त्यांच्यापासून वांचविले. याच्या परिणामांत मग रोमन बादशाह टेटस्ला अल्लाहने त्यांच्यावर आधिपत्य देऊन टाकले. त्याने येरूशलेमवर हल्ला करून, प्रेतांचे ढीग लावून दिले; आणि पुष्कळशांना कैदी बनवून घेतले. त्यांची संपत्ती लुटून नेली, त्यांच्या धार्मिक ग्रंथांना पायाखाली तुडविले, आणि बैतुल मुकद्दस आणि हैकल सुलैमानीची नासधूस केली. आणि त्यांना नेहमी करीता बैतुल मुकद्दसहून हद्दपार करून टाकले. आणि अशाप्रकारे त्यांची खूप अप्रतिष्ठा आणि फजिती केली. ही बर्बादी त्यांच्यावर इसवी सन ७० मध्ये आली.

عَسٰی رَبُّکُمۡ اَنۡ یَّرۡحَمَکُمۡ ۚ وَاِنۡ عُدۡتُّمۡ عُدۡنَا ۘ وَجَعَلۡنَا جَهَنَّمَ لِلۡکٰفِرِیۡنَ حَصِیۡرًا ﴿۸﴾

**आशा आहे की, तुमचा पालनकर्ता तुमच्यावर दया करेल. होय! जर तुम्ही पुन्हा तेच करू लागलेत; तर आम्ही पण दुसऱ्यादा सुद्धा असेच करू[१]. आणि आम्ही नाकारणाऱ्यांसाठी, तुरूंग, नरकाग्नी बनवून ठेवला आहे[२]. ⑧**

اِنَّ هٰذَا الۡقُرۡاٰنَ یَهۡدِیۡ لِلَّتِیۡ هِیَ اَقۡوَمُ وَیُبَشِّرُ الۡمُؤۡمِنِیۡنَ الَّذِیۡنَ یَعۡمَلُوۡنَ الصّٰلِحٰتِ اَنَّ لَهُمۡ اَجۡرًا کَبِیۡرًا ۙ﴿۹﴾

**खचित्‌च हे कुरआन तो मार्ग दाखवितो, जो फारच सरळ आहे; आणि ईमानवाल्यांना, जे चांगली कामे करतात, या गोष्टीची खुष खबर देतो की, त्यांच्यासाठी फार मोठे प्रतिफळ आहे. ⑨**

وَّاَنَّ الَّذِیۡنَ لَا یُؤۡمِنُوۡنَ بِالۡاٰخِرَةِ اَعۡتَدۡنَا لَهُمۡ عَذَابًا اَلِیۡمًا ﴿۱۰﴾

**आणि हे की जे लोक परलोकावर विश्वास ठेवत नाही, त्यांच्यासाठी आम्ही दु:खदायक शिक्षा तयार करून ठेवली आहे. ⑩**

وَیَدۡعُ الۡاِنۡسَانُ بِالشَّرِّ دُعَآءَهٗ بِالۡخَیۡرِ ؕ وَکَانَ الۡاِنۡسَانُ عَجُوۡلًا ﴿۱۱﴾

**आणि मनुष्य वाईट गोष्टीसाठी दुआ करतो, जसे तो आपल्यासाठी चांगल्या गोष्टींच्या दुआ करतो; मनुष्य आहेच मोठा उतावळा[३] ⑪**

وَجَعَلۡنَا الَّیۡلَ وَالنَّهَارَ اٰیَتَیۡنِ فَمَحَوۡنَاۤ اٰیَةَ الَّیۡلِ وَجَعَلۡنَاۤ اٰیَةَ النَّهَارِ مُبۡصِرَةً لِّتَبۡتَغُوۡا فَضۡلًا مِّنۡ رَّبِّکُمۡ وَلِتَعۡلَمُوۡا عَدَدَ السِّنِیۡنَ وَالۡحِسَابَ ؕ وَکُلَّ شَیۡءٍ فَصَّلۡنٰهُ تَفۡصِیۡلًا ﴿۱۲﴾

**आणि आम्ही रात्र आणि दिवसाला आपल्या सामर्थ्याची निशाणी बनविली आहे. रात्रीच्या निशाणीला तर आम्ही पुसट आणि मंद केले. आणि दिवसाच्या निशाणीला प्रकाशित, (प्रत्येक वस्तुला) दाखवणारी बनविली आहे. यासाठी तुम्ही आपल्या पालनकर्त्याचे औदार्य (रोजी) चा, शोध घ्यावा. आणि यासाठी सुद्धा की, वर्षांची गणती आणि हिशेब ठाऊक करून घेऊ शकावे[४].आणि प्रत्येक गोष्टीला आम्ही फार चांगल्याप्रकारे सांगून टाकले आहे.[५] ⑫**

१) ही त्यांना तंबीह देण्यात आली की, जर तुम्ही सुधारणा करून घेतली तर अल्लाहच्या दयेला पात्र व्हाल. ज्याचा अर्थ इहलोक व परलोक या दोहोत कार्य सिद्धी व यश आहे. आणि जर दुसऱ्यांदा अल्लाहतआलाच्या आज्ञाभंगाचा मार्ग अनुसरून, जर तुम्ही मुलुखांत फिसाद फैलावण्याचा प्रयत्न केला; तर मग आम्ही तुम्हांस अशाच प्रकारे, फजिती आणि अप्रतिष्ठेत व्यस्त करू; जसे याच्यापूर्वी दोन वेळा, तुमच्या बरोबर हा मामला करून चुकले आहेत. आणि झालेही असेच! हे यहूदी आपल्या खोडसाळपणापासून परावृत्त झाले नाहीत. आणि तेच कर्तव्य ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीच्या बाबतीत पुन्हा केले; जे मूसा عليه السلام च्या पैगंबरी आणि ह.ईसा عليه السلام च्या पैगंबरीच्या बाबतीत त्यांनी केले होते. ज्याच्या परिणामांत हे यहूदी तिसऱ्या वेळी, मुसलमानांच्या हातांनी, फजित आणि अप्रतिष्ठीत झाले; आणि फजित होऊन त्यांना मदीना आणि खैबरहून निघावे लागले.

२) म्हणजे या जगांतील फजितीनंतर परलोकांत, नरकाग्नीचा बदला आणि शिक्षा वेगळी आहे, जो त्यांना तेथे भोगावा लागेल.

३) मनुष्य कारण की उतावळा आणि अधैर्यवान आहे, म्हणून जेव्हा त्याला त्रास होतो तेव्हा तो आपल्या बर्बादीसाठी अशाप्रकारे दुआ करतो; ज्याप्रमाणे भलाईसाठी आपल्या पालनकर्त्याकडे दुआ करतो. ही तर पालनकर्त्याची कृपा आणि दया आहे की तो त्याच्या वाईट दुआ मान्य करीत नाही. हाच विषय सू.यूनुस महावाक्य ११ मध्ये येऊन चुकला आहे.

४) म्हणजे रात्रीला अप्रकाशित म्हणजे अंध:कारमय करून टाकले की तुम्ही आराम करू शकावा. आणि तुमचा दिवसभराचा थकवा दूर होऊन जावा; आणि दिवसाला प्रकाशित केले की, रोजी मिळविण्यासाठी तुम्ही अल्लाहच्या कृपेचा शोध घ्यावा. याशिवाय रात्र आणि दिवसाचा दुसरा फायदा हा आहे की, अशाप्रकारे आठवडे, महिने आणि वर्षांची गणती आणि हिशेब तुम्ही करू शकावा. या हिशेबाचे पण असंख्य फायदे आहेत. जर रात्रीच्या नंतर दिवस, आणि दिवसानंतर रात्र आली नसती, किंबहुना नेहमी रात्रच रात्र किंवा दिवसच दिवस राहिला असता तर तुम्हाला आराम आणि विश्रांतीची, किंवा व्यवहार करण्याची संधी मिळाली नसती; आणि अशाचप्रकारे महिने आणि वर्षांचा हिशेब पण शक्य झाला नसता.

५) म्हणजे माणसाकरिता धर्म आणि इहलोकाच्या आवश्यक गोष्टी आम्ही स्पष्ट करून सांगून टाकल्या आहेत. कारण की त्यापासून माणसाने फायदा उचलावा; आपली दुनियापण सांवरून घ्यावी, आणि परलोकाचीपण काळजी, आणि त्याच्यासाठी तयारी करावी.

وَكُلَّ اِنۡسَانٍ اَلۡزَمۡنٰهُ طٰٓئِرَهٗ فِىۡ عُنُقِهٖ ؕ وَنُخۡرِجُ لَهٗ يَوۡمَ الۡقِيٰمَةِ كِتٰبًا يَّلۡقٰٮهُ مَنۡشُوۡرًا ﴿۱۳﴾

आणि आम्ही प्रत्येक माणसाचे बरे वाईट त्याच्या गळ्यात घालून टाकले आहे[१]. आणि कयामतच्या दिवशी आम्ही त्याच्यासमोर त्याचे कर्मपत्र काढू ज्याला तो आपल्यावर खुले पावेल; (१३)

اِقۡرَاۡ كِتٰبَكَ ؕ كَفٰى بِنَفۡسِكَ الۡيَوۡمَ عَلَيۡكَ حَسِيۡبًا ؕ ﴿۱۴﴾

हो! स्वत:च आपले पुस्तक वाचून घे. आज तर तू स्वत: आपला हिशेब घेण्यांस पुरेसा आहे (१४)

مَنِ اهۡتَدٰى فَاِنَّمَا يَهۡتَدِىۡ لِنَفۡسِهٖ ۚ وَمَنۡ ضَلَّ فَاِنَّمَا يَضِلُّ عَلَيۡهَا ؕ وَلَا تَزِرُ وَازِرَةٌ وِّزۡرَ اُخۡرٰى ؕ وَمَا كُنَّا مُعَذِّبِيۡنَ حَتّٰى نَبۡعَثَ رَسُوۡلًا ﴿۱۵﴾

जो सरळमार्ग अनुसरेल, तो स्वत:च आपल्या भल्यासाठी मार्ग धरतो; आणि जो भटकून जाईल, त्याचे ओझे त्याच्यावरच आहे. कोणी ओझे उचलणारा, कोण्या दुसऱ्याचे ओझे, आपल्यावर लादणार नाही[२]; आणि आम्हा सही सवय नाही की पैगंबर पाठविण्यापूर्वीच शिक्षा करु लागावी[३] (१५)

وَاِذَاۤ اَرَدۡنَاۤ اَنۡ نُّهۡلِكَ قَرۡيَةً اَمَرۡنَا مُتۡرَفِيۡهَا فَفَسَقُوۡا فِيۡهَا فَحَقَّ عَلَيۡهَا الۡقَوۡلُ فَدَمَّرۡنٰهَا تَدۡمِيۡرًا ﴿۱۶﴾

आणि जेव्हा आम्ही कोण्या वस्तीच्या नष्ट करण्याचा इरादा करून घेतो तर तेव्हा तेथील सुखसंपन्न लोकांवर (काही) हुकूम बजावितो; आणि ते या वस्तीत खुल्लम खुल्ला आज्ञाभंग करू लागतात; तेव्हा त्यांच्यावर (शिक्षा) गोष्ट सिद्ध होऊन जाते; मग आम्ही त्यांची धुळधाण करून टाकतो.[४] (१६)

وَكَمۡ اَهۡلَكۡنَا مِنَ الۡقُرُوۡنِ مِنۡۢ بَعۡدِ نُوۡحٍ ؕ وَكَفٰى بِرَبِّكَ بِذُنُوۡبِ عِبَادِهٖ خَبِيۡرًاۢ بَصِيۡرًا ﴿۱۷﴾

आणि आम्ही नूहनंतर, सुद्धा पुष्कळसे लोक समूह नष्ट करून टाकले; आणि तुझा पालनकर्ता आपल्या सेवकांच्या अपराधांशी पुरेसा वाकबगार, आणि पाहता सवरतांआहे[५] (१७)

مَنۡ كَانَ يُرِيۡدُ الۡعَاجِلَةَ عَجَّلۡنَا لَهٗ فِيۡهَا مَا نَشَآءُ لِمَنۡ نُّرِيۡدُ ثُمَّ جَعَلۡنَا لَهٗ جَهَنَّمَ ۚ يَصۡلٰٮهَا مَذۡمُوۡمًا مَّدۡحُوۡرًا ﴿۱۸﴾

जो कोणी या क्षणभंगुर जगाचा इच्छुक असेल, त्याला आम्ही ज्याप्रकारे इच्छु तुर्तातुर्त देऊन टाकतो; सरशेवटी, त्याच्या करीतांआम्ही नरकाग्नी निश्चित करून देतो. जेथे तो बुरेहाल होऊन, व धुत्कारलेला असा दाखल होईल[६] (१८)

وَمَنۡ اَرَادَ الۡاٰخِرَةَ وَسَعٰى لَهَا سَعۡيَهَا وَهُوَ مُؤۡمِنٌ فَاُولٰٓئِكَ كَانَ سَعۡيُهُمۡ مَّشۡكُوۡرًا ﴿۱۹﴾

आणि जो परलोकाचा इच्छुक असेल, आणि जसा प्रयत्न त्याच्यासाठी केला पाहिजे, तो करीतपण असेल, आणि तो ईमानवालापण असेल, बस! हेच ते लोक आहेत, ज्यांच्या प्रयत्नांची,अल्लाहजवळ कदर केली जाईल[७] (१९)

كُلًّا نُّمِدُّ هٰٓؤُلَآءِ وَهٰٓؤُلَآءِ مِنۡ عَطَآءِ رَبِّكَ ؕ وَمَا كَانَ عَطَآءُ رَبِّكَ مَحۡظُوۡرًا ﴿۲۰﴾

प्रत्येकाला आम्ही, (रोजी) मिळवून देतो; यांनापण आणि त्यांना पण; तुझ्या पालनकर्त्याच्या बक्षीसामधून. तुझ्या पालनकर्त्याचे दान (देणे) थांबलेले नाही[८] (२०)

اُنۡظُرۡ كَيۡفَ فَضَّلۡنَا بَعۡضَهُمۡ عَلٰى بَعۡضٍ ؕ وَلَلۡاٰخِرَةُ اَكۡبَرُ دَرَجٰتٍ وَّاَكۡبَرُ تَفۡضِيۡلًا ﴿۲۱﴾

पाहून घे! की याच्यात एकाला एकावर, आम्ही कशाप्रकारे श्रेष्ठत्व देऊन ठेवले आहे. आणि परलोक तर वर्गवारीच्या दृष्टीने, आणखीही वरचढ आहे; आणि श्रेष्ठत्वाच्या अनुषंगाने पण फार मोठे आहे[९] (२१)

१) ताईरचा अर्थ पक्ष्याचा आहे. आणि 'उनुक' चा अर्थ गळ्याचा. इमाम इब्ने कसीरने ताईरने अभिप्रेत मनुष्याची कर्मे घेतला आहे. 'फी उनुकीही' चा अर्थ, आहे त्याची चांगली किंवा वाईट कर्मे ज्यावर याला चांगले किंवा वाईट प्रतिफळ दिले जाईल. जी गळ्यांतील हाराप्रमाणे त्याच्या बरोबर राहील. म्हणजे त्याचे प्रत्येक कर्म लिहले जात आहे. अल्लाहजवळ याचा पूर्ण रेकॉर्ड सुरक्षित असेल. कयामतच्या दिवशी याच्याप्रमाणे त्याचा फैसला केला जाईल. आणि इमाम शौकानीने ताईर ने अभिप्रेत, मनुष्याचे भाग्य घेतले आहे. जे अल्लाहतआलाने आपल्या ज्ञानाने पहिलेच लिहून ठेवले आहे. ज्याला अल्लाहचा आज्ञाधारक व्हावयाचे होते ते अल्लाहला ठाऊक होते; आणि ज्याला अवज्ञाकारी व्हावयाचे होते, ते पण त्याला ठाऊक होते. हेच दैव (सद्‌भाग्य किंवा दुर्भाग्य) प्रत्येक मनुष्याबरोबर गळ्यांतील

हाराप्रमाणे, चिटकलेले आहे. त्याच्याप्रमाणे त्याची कर्मे असतील, आणि कयामतच्या दिवशी, याच्याप्रमाणे, फैसले होतील.

२) तथापि जो 'जाल' (मार्गभ्रष्ट) 'मुजिल्ल' (मार्गभ्रष्ट करणारे) पण असतील. त्यांना आपल्या मार्गभ्रष्टतेच्या ओझ्याबरोबर, त्यांच्या अपराधांचे ओझे सुद्धा (त्यांच्या गुन्ह्यात काहीही कमी केल्याशिवाय) उचलावे लागेल, जे यांच्या प्रयत्नाने गुमराह झाले असतील; जसे की कुरआनांत दुसऱ्या ठिकाणी आणि हदीर्शींनी स्पष्ट आहे, हे वास्तविक त्यांच्या आपल्याच पापांचे ओझे असेल, जे दुसऱ्यांना मार्गभ्रष्ट करून, त्यांनी कमविले असेल.

३) काही भाष्यकारांनी याच्याने फक्त ऐहिक शिक्षा अभिप्रेत धरल्या आहेत. म्हणजे परलोकाच्या शिक्षे पासून सुट मिळणार नाही. परंतु कुरआन करीमच्या दुसऱ्या ठिकाणावरून स्पष्ट आहे की, अल्लाहतआला लोकांना विचारीन, काय तुमच्याजवळ माझे पैगंबर आले नव्हते? ज्यात ते होकारार्थी उत्तर देतील; ज्यामुळे हे ठाऊक होते की पैगंबर पाठविणे आणि पुस्तक अवतरित केल्याशिवाय कोणाला शिक्षा करणार नाही. तथापि त्याचा निणर्य की कोणत्या लोकांजवळ, किंवा कोण्या माणसापर्यंत, त्याचा संदेश पोहचला नाही; कयामतच्या दिवशी तो स्वत:च सांगेन; तेथे खचित्च कोणाबरोबर जुलुम केला जाणार नाही. अशाचप्रकारे बहिरा, वेडा, कमी अकलेचा, आणि दोन पैगंबरांच्या काळाच्या मध्यंतरात, मृत्यू पावणाऱ्या लोकांची समस्या आहे; त्यांच्या बाबतीत काही रिवायतीमध्ये येते की, कयामतच्या दिवशी अल्लाहतआला त्यांच्याकडे देवदूत पाठवेल, आणि ते त्यांना सांगतील की नरकाग्नीत दाखल होऊन जा! जर ते अल्लाहच्या हुकुमाला मानून नरकाग्नीत दाखल होऊन जातील; तर नरकाग्नीत त्यांच्यासाठी फुलांचा एक बाग बनून जाईल. आणि याच्या दुसऱ्या स्थितीत त्यांना ओढून, नरकाग्नीत फेकून देण्यात येईल. (मुसनद अहमद) परंतु पुष्कळसे मुहद्देसीन जवळ याच्या उलट, दोन पैगंबरांच्या काळातील मध्यंतरातील लोकांची नरकाग्नीत जाण्याची रिवायत स्पष्टपण आहे; आणि त्याच्या विरूद्ध पण. लहान मुलांच्या बाबतीत मतभेद आहे. मुसलमानांची मुले तर स्वर्गांतच जातील. तथापि काफिर आणि मुशरिकीनच्या मुलांच्या बाबतीत मतभेद आहेत. काही थोड्या वेळानंतर जाण्याचे, कोणी स्वर्गांत जाण्याचे, कोणी नर्कात जाण्याचे मानतात. इमाम इब्ने कसीर म्हणतात, हशरच्या मैदानांत, त्यांची परीक्षा घेतली जाईल. जो अल्लाहच्या आज्ञेचे पालन करेल, तो स्वर्गांत, आणि जो आज्ञापालन करणार नाही, नर्कांत जाईल. इमाम इब्ने कसीरने याच म्हणण्याला प्राधान्य दिले आहे. आणि म्हटले आहे की, याच्या उलट रिवायतीमध्ये, ज्याच्याप्रमाणे ठाऊक होते की, मुशरिकीनची मुले पण स्वर्गांत जातील. (स.बुखारी)

४) याच्यांत ते तत्त्व दाखविण्यांत आले आहे, ज्याच्या अनुषंगाने, लोकांच्या नष्ट करण्याचा निर्णय घेण्यात येतो. आणि तो हा की, सुखी लोकांचा वर्ग अल्लाहच्या हुकूमांचा आज्ञाभंग करू लागतो; आणि त्याचे अनुकरण मग दुसरे लोक करू लागतात; अशा प्रकारे त्या समाजांत आज्ञाभंग सर्वत्र होऊं लागतो; आणि मग तो शिक्षेला पात्र समजला जातो.

५) ते पण या नष्ट करण्याच्या तत्त्वाच्या अंतर्गतच नष्ट झाले.

६) म्हणजे इहलोकाच्या प्रत्येक इच्छुकाला , पण इहलोक (दुनिया) मिळत नाही; फक्त त्याला मिळते ज्याला आम्ही इच्छितो. मग त्याला पण तेवढी दुनिया मिळत नाही, जेवढी तो इच्छितो; किंबहुना तेवढीच मिळते, जेवढी आम्ही त्याच्यासाठी, निर्णय करून टाकू. परंतु या इहलोकाच्या इच्छेचा परिणाम, नरकाग्नीची कायमची शिक्षा आणि त्याची फटफजिती आहे. यामुळे माणसाने परलोकाची काळजी करावी, न की इहलोकाची.

७) अल्लाहतआलाच्या जवळ कदर करण्यासाठी, तीन गोष्टी येथे वर्णन करण्यांत आल्या आहेत. (१) परलोकाचा इरादा म्हणजे निखालस वृत्ती (इखलास) आणि अल्लाहला प्रसन्न करण्याची भावना (२) आणि असा प्रयत्न जो त्याच्या योग्य असेल; म्हणजे सुन्नतप्रमाणे (३) ईमान, कारण की, याचे शिवाय कोणतेही सुकृत्य पण, लक्ष देण्यायोग्य नाही आणि म्हणजे कर्माच्या मान्यतेसाठी, ईमानाबरोबर इखलास (म्हणजे निव्वळ अल्लाहसाठीच) पैगंबरांच्या सुन्नतप्रमाणे, असणे आवश्यक आहे.

८) म्हणजे या जगातील रोजी आणि सुखसोयी, आम्ही मोमिन आणि काफिर याच्यांत भेदभाव केल्याशिवाय, इहलोक आणि परलोकाचे इच्छुक, सर्वांना देत असतो. अल्लाहच्या देणग्या कोणापासूनच अडविल्या जात नाही.

९) तथापि जगांतील या वस्तू, कोणाला कमी, कोणाला जास्त मिळतात. अल्लाहतआला आपल्या बुद्धी आणि प्रयोजनानुसार या उपजिविकेची (रोजीची) वांटणी करतो. तथापि परलोकांत, ही वर्गवारी जास्त स्पष्ट आणि ठळक होऊन जाईल. आणि तो अशा प्रकारे की ईमानवाले स्वर्गांत, आणि कुफ्रवाले, नरकाग्नीत जातील.

لَا تَجْعَلْ مَعَ اللّٰهِ اِلٰهًا اٰخَرَ فَتَقْعُدَ مَذْمُوْمًا مَّخْذُوْلًا ﴿۲۲﴾

अल्लाह बरोबर आणखी कोणाला उपास्य ठरवू नकोस, नाही तर तू वाईट स्थितीत, लाचार होऊन बसून राहशील ㉒

وَقَضٰى رَبُّكَ اَلَّا تَعْبُدُوْٓا اِلَّآ اِيَّاهُ وَبِالْوَالِدَيْنِ اِحْسَانًا ؕ اِمَّا يَبْلُغَنَّ عِنْدَكَ الْكِبَرَ اَحَدُهُمَآ اَوْ كِلٰهُمَا فَلَا تَقُلْ لَّهُمَآ اُفٍّ وَّلَا تَنْهَرْهُمَا وَقُلْ لَّهُمَا قَوْلًا كَرِيْمًا ﴿۲۳﴾

आणि तुझा पालनकर्ता अगदी स्पष्ट हुकूम देऊन चुकला आहे की, तुम्ही त्याच्याशिवाय इतरांची उपासना करू नये; आणि आईबापांशी चांगले वर्तन ठेवावे; जर तुझ्या उपस्थितीत, त्यांच्यातून एक किंवा दोन्ही , वृद्धत्वाला पोहचून जातील, तर त्यांच्यासमोर उफ् सुद्धा म्हणू नये. तसेच त्यांना दाटदपट करू नये. किंबहुना त्यांच्याबरोबर सन्मानाने संभाषण करावे[१] ㉓

وَاخْفِضْ لَهُمَا جَنَاحَ الذُّلِّ مِنَ الرَّحْمَةِ وَقُلْ رَّبِّ ارْحَمْهُمَا كَمَا رَبَّيٰنِيْ صَغِيْرًا ﴿۲۴﴾

आणि नम्रता आणि प्रेमाने, त्यांच्या समोर विनयाची बाजू नमवावी[२]; आणि त्यांच्यासाठी प्रार्थना करीत रहावे की, हे माझ्या पालनकर्त्या! त्यांच्यावर अशीच दया कर, जसे त्यांनी माझ्या बालपणी, माझे पालनपोषण केले आहे ㉔

رَبُّكُمْ اَعْلَمُ بِمَا فِيْ نُفُوْسِكُمْ ؕ اِنْ تَكُوْنُوْا صٰلِحِيْنَ فَاِنَّهٗ كَانَ لِلْاَوَّابِيْنَ غَفُوْرًا ﴿۲۵﴾

जे काही तुमच्या मनांत आहे, त्याला तुमचा पालनकर्ता फार चांगल्या प्रकारे जाणतो. जर तुम्ही सदाचरणी असाल; तर तो पश्चात्ताप व्यक्त करणाऱ्यांना क्षमा करणारा आहे. ㉕

وَاٰتِ ذَا الْقُرْبٰى حَقَّهٗ وَالْمِسْكِيْنَ وَابْنَ السَّبِيْلِ وَلَا تُبَذِّرْ تَبْذِيْرًا ﴿۲۶﴾

आणि नातेवाईकांचा आणि गोरगरीबांचा आणि वाटसरूंचा हक्क पोहचवित रहा.[३] आणि उधळपट्टी आणि अनाठायी खर्चाने वांचत रहा ㉖

१) या महावाक्यात अल्लाह तबारक व तआलाने, आपल्या उपासनेनंतर, दुसऱ्या क्रमांकावर आई बापांशी चांगल्या वागणुकीचा हुकूम दिला आहे. ज्याने आईबापांचे आज्ञापालन, त्यांची सेवा, आणि त्यांच्यासाठी, आदर व मान सन्मानाचे महत्त्व स्पष्ट होते. जणू अल्लाहच्या मोठ्या पालकत्वाला मानण्याच्या बरोबरच आई वडिलांची आज्ञापालन करणे आवश्यक आहे. हदीशींमध्ये सुद्धा, याच्या महत्त्व आणि ताकीदीला, खुपच स्पष्ट करून देण्यात आले आहे. मग म्हातरपणांत, विशेष म्हणून, त्यांच्या समोर 'उफ' पण म्हणणे, आणि त्यांना दाटण्या दपटण्यापासून, मना करण्यांत आले आहे; कारण की, म्हातारपणांत आईबाप दुर्बल लाचार होऊन जातात; जेव्हा की संतती तरूण, आणि रोजी कमविण्यावर, कब्जा करून घेते. याशिवाय तारूण्याच्या पागल भावना, आणि वृद्धत्वाचे थंड व गरम, चाखलेल्या अनुभवांत, टकराव होतो. या स्थितीत आईबापाच्या आदर सन्मानाच्या मागणीला राखून ठेवणे फारच कठीण मामला असतो. तथापि अल्लाहजवळ तोच यशस्वी होईल, जो मागण्यांची काळजी घेईल.

२) पक्षी जेव्हा आपल्या पिलांना वात्सल्याच्या छायेत घेतो, तेव्हा त्यांच्यासाठी आपले पंख खाली करून देतो. म्हणजे तू पण आईबापांबरोबर, चांगला प्रेमपूर्ण मामला कर, आणि त्यांची अशा प्रकारे देखभाल कर, ज्याप्रमाणे त्यांनी बालपणी तुझी देखभाल केली. किंवा हा अर्थ आहे की, जेव्हा पक्षी उडण्याचा आणि उंचावर जाण्याचा प्रयत्न करतो, तेव्हांआपले पंख पसरवून देतो; आणि जेव्हा खाली उतरतो, तेव्हा पंखांना खाली करून घेतो. या अनुषंगाने बाजुंना खाली करण्याचा अर्थ, आईबापांबरोबर आदर सन्मान आणि नम्रता जाहीर करण्याचा होईल.

३) कुरआन करीमच्या या शब्दांनी ठाऊक झाले की, गरीब नातेवाईक, गोरगरीब आणि गरजू वाटसरू यांची मदत करून, त्यांच्यावर उपकार केल्याचे दाखविले न जावे; कारण की हा त्यांच्यावर उपकार नाही. किंबहुना संपत्तीचा तो हक्क आहे. जो अल्लाहतबारक व तआलाने धनवानांच्या धनांत, चर्चित गरजुंचा ठेवला आहे. जर धनवान हा हक्क अदा करणार नाही. तर अल्लाहजवळ अपराधी होईल. जणू ही हक्काची पूर्तता आहे, कोणावर उपकार नाही. याशिवाय नातेवाईकांच्या प्रथम उल्लेखाने त्यांची प्राथमिकता आणि त्यांचा हक्कपण स्पष्ट होतो. नातेवाईकांच्या हक्काचे अदा करणे, आणि त्यांच्या बरोबर चांगल्या वागणुकीला 'सिला रहमी' म्हणण्यात येते. ज्याची इस्लाममध्ये, मोठी ताकीद आहे.

إِنَّ الْمُبَذِّرِينَ كَانُوا إِخْوَانَ الشَّيَاطِينِ ۖ وَكَانَ الشَّيْطَانُ لِرَبِّهِ كَفُورًا ﴿٢٧﴾

**नि:संशय अनाठायी खर्च करणारे, शैतानाचे भाऊ आहेत;आणि शैतान आपल्या पालनकर्त्याप्रत मोठाच कृतघ्न आहे(१). २७**

وَإِمَّا تُعْرِضَنَّ عَنْهُمُ ابْتِغَاءَ رَحْمَةٍ مِّن رَّبِّكَ تَرْجُوهَا فَقُل لَّهُمْ قَوْلًا مَّيْسُورًا ﴿٢٨﴾

**आणि जर तुला, त्यांच्याकडून तोंड फिरवून घ्यावे लागेल, आपल्या पालनकर्त्याच्या दयेच्या आकांक्षेत; ज्याची तूंआशा बाळगतो, तरी सुद्धा तुला पाहिजे की उत्तम रीतीने आणि नम्रतेने त्यांना समजाऊन दे (२) २८**

وَلَا تَجْعَلْ يَدَكَ مَغْلُولَةً إِلَىٰ عُنُقِكَ وَلَا تَبْسُطْهَا كُلَّ الْبَسْطِ فَتَقْعُدَ مَلُومًا مَّحْسُورًا ﴿٢٩﴾

**आणि आपला हात आपल्या गळ्याशी बांधून ठेवू नकोस, आणि एकदम मोकळा करून त्याला सुटा ठेवू नकोस; की मग तू दोषास पात्र होऊन, पश्चात्ताप करीत बसून जाशील (३) २९**

إِنَّ رَبَّكَ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَن يَشَاءُ وَيَقْدِرُ ۚ إِنَّهُ كَانَ بِعِبَادِهِ خَبِيرًا بَصِيرًا ﴿٣٠﴾

**खचित्च तुझा पालनकर्ता ज्याच्यासाठी इच्छितो, विपुल अन्नसंपत्ती देतो; आणि ज्याच्या करीता इच्छितो, काटकसरीने देतो(४). खचित्च तो आपल्या सेवकांशी वाकबगार, आणि खूप पाहणारा आहे. ३०**

१) तबजीर चे मूळ बजर (बी) आहे. ज्याप्रमाणे जमिनीत बी टाकतांना, हे पाहिले जात नाही की, हे योग्य ठिकाणी पडले जात आहे, किंवा त्यापासून इकडे तिकडे; किंबहुना शेतकरी बी टाकत चालला जातो. 'तबजीर' (उधळपट्टी) पण हेच आहे; की मनुष्य आपले धन, बी प्रमाणे उडवीत जाईन. आणि खर्च करतांना शरियतच्या मर्यादेला ओलांडून टाकेन. आणि काही म्हणतात की, 'तबजीर' चा अर्थ, अयोग्य कामात खर्च करणे आहे, मग ते थोडे का असेना! आमच्या विचारात दोन्हीही प्रकार 'तबजीर' मध्ये येतात. आणि हे इतके वाईट कर्म आहे की, असे करणाऱ्याला, शैतानासारखी समानता आहे. आणि शैतानासारखे होण्यापासून वांचले पाहिजे. मग जरी तो एकच दुर्गुण का असेना! हे मनुष्याकरिता फारच अवश्य (वाजीब) आहे. मग शैतानाला 'कफूर' (फार कृतघ्न) म्हणून, त्याचे पासून आणखी वांचण्याची ताकीद करून दिली आहे. की, जर तुम्ही शैतानाशी समानता अंगीकारली, तर तुम्ही सुद्धा अशाप्रकारे 'कफूर' ठरविले जाल. (फत्हुल कदीर)

२) म्हणजे आर्थिक क्षमतेच्या कमी होण्यामुळे, ज्याला दूर करण्यासाठी, आणि विपुल अन्नसंपत्तीची तर, आपल्या पालनकर्त्याकडे आशा बाळगतो. जर तुला गरीब नातेवाईक, गोरगरीब आणि गरजु कडून तोंड फिरवण्याची पाळी आली म्हणजे देण्यांत असमर्थ असल्याचे सांगावे लागले तर, नम्रता आणि उत्तम प्रकारे असमर्थता व्यक्त कर. म्हणजे नकार जरी दिला गेला तरी नरमी आणि प्रेमाच्या भाषेत, न की संतापून आणि अशिष्टतेने. जसे की सर्व साधारणपणे लोक, गरजूंआणि गोरगरीबांशी करतात.

३) मागच्या महावाक्यात नकार देण्याची पद्धत सांगण्यात आली. आता खर्च करण्याची पद्धत सांगण्यात येत आहे; आणि ती अशी आहे की, मनुष्याने कंजुषी करू नये की, आपल्यावर आणि आपल्या मुलाबाळांच्या आवश्यकतांवर सुद्धा खर्च करू नये. न उधळ पट्टीच करावी; की आपली आर्थिक क्षमता पाहिल्याशिवायच, काहीही विचार न करतां, खर्च करीत रहावे. कंजुषीचा परिणाम हा होईल की, मनुष्य निंदा आणि निर्भत्सनेला पात्र होऊन जावा. आणि उधळपट्टीच्या परिणामांत, थकलेला आणि पश्चात्ताप पावलेला होऊन जावा. 'महसूर' त्या जनावराला म्हणतात, जे चालून चालून थकून गेलेले, आणि चालण्याला असमर्थ होऊन गेले असेल. उधळपट्टी करणारापण शेवटी, खाली हात होऊन बसून जातो. आपल्या हाताला आपल्या गळ्याशी बांधून ठेऊ नकोस,' हा इशारा आहे कंजुषीकडे. 'न त्याला एकदम सोडून दे.' हा इशारा आहे उधळपट्टीकडे.

४) यात ईमानवाल्यांसाठी सांत्वना आहे की, त्यांच्याजवळ अन्न संपत्तीची विपुलता नाही, तर त्याचा अर्थ असा नाही की, अल्लाहजवळ त्यांचे काही स्थान नाही. किंबहुना ही अन्न संपत्तीची विपुलता किंवा कमतरता, यांचा संबंध अल्लाहच्या त्या बुद्धी आणि प्रयोजनाशी आहे, ज्याला फक्त तोच जाणतो. तो आपल्या शत्रुंना 'कारून' बनवून टाकेल, आणि आपल्या सेवकांना एवढेच देईल, ज्याच्याने ते मोठ्या मुश्कीलीने आपली गुजराण करूंशकतील. ही त्याची मर्जी आहे. ज्याला तो जास्त देईल, तर हे आवश्यक नाही की तो प्रिय असावा आणि ज्याला कमी देईल तर हेही आवश्यक नाही की, त्याच्याशी नाराज असावा.

وَلَا تَقْتُلُوٓا اَوْلَادَكُمْ خَشْيَةَ اِمْلَاقٍ ؕ نَحْنُ نَرْزُقُهُمْ
وَاِيَّاكُمْ ؕ اِنَّ قَتْلَهُمْ كَانَ خِطْاً كَبِيْرًا ﴿٣١﴾

आणि दारिद्र्याच्या भयाने आपल्या संततीला मारून टाकू नका. त्यांना आणि तुम्हाला आम्हीच अन्नसंपत्ती देतो. खचितच्‌ त्यांना ठार मारणे, मोठा गुन्हा आहे[१]. (३१)

وَلَا تَقْرَبُوا الزِّنٰٓى اِنَّهٗ كَانَ فَاحِشَةً ؕ وَسَآءَ سَبِيْلًا ﴿٣٢﴾

आणि खबरदार! व्याभिचाराच्या जवळही फटकू नका; कारण तो मोठाच, निर्लज्जपणा आहे; आणि फारच वाईट मार्ग आहे[२]. (३२)

وَلَا تَقْتُلُوا النَّفْسَ الَّتِىْ حَرَّمَ اللّٰهُ اِلَّا بِالْحَقِّ ؕ وَمَنْ
قُتِلَ مَظْلُوْمًا فَقَدْ جَعَلْنَا لِوَلِيِّهٖ سُلْطٰنًا فَلَا يُسْرِفْ
فِّى الْقَتْلِ ؕ اِنَّهٗ كَانَ مَنْصُوْرًا ﴿٣٣﴾

आणि कोण्या जिवाला, ठार मारणे, अल्लाहने हराम करून टाकले आहे. त्याला हकनाक ठार करू नका[३]; आणि जो मनुष्य जुलूम केलेल्या स्वरूपांत, मारून टाकला जाईल, आम्ही त्याच्या वारसाला शक्ती देऊन ठेवली आहे. तर त्याला पाहिजे की त्याने मारून टाकण्यात अतिरेक करू नये. नि:संशय त्याची मदत करण्यात आली आहे[४]. (३३)

وَلَا تَقْرَبُوْا مَالَ الْيَتِيْمِ اِلَّا بِالَّتِىْ هِىَ اَحْسَنُ حَتّٰى
يَبْلُغَ اَشُدَّهٗ ۪ وَاَوْفُوْا بِالْعَهْدِ ۚ اِنَّ الْعَهْدَ كَانَ
مَسْـُٔوْلًا ﴿٣٤﴾

आणि अनाथाच्या संपत्ती जवळ फटकू नका. पण अशा रीतीने की जी उत्तम असेल, येथ पावेतो की, तो आपल्या भरजवानीला पोहचून जावा[५]. आणि वायदे पुरे करा, कारण की करारमदारांची विचारपूस होणार आहे. [६] (३४)

وَاَوْفُوا الْكَيْلَ اِذَا كِلْتُمْ وَزِنُوْا بِالْقِسْطَاسِ الْمُسْتَقِيْمِ ؕ
ذٰلِكَ خَيْرٌ وَّاَحْسَنُ تَاْوِيْلًا ﴿٣٥﴾

आणि जेव्हा मापून द्याल, तर पूरे पर माप द्या. आणि सरळ तराजुने तोलत जा; हेच उत्तम[७] आहे आणि परिणामाच्या दृष्टीनेपण चांगले आहे. (३५)

وَلَا تَقْفُ مَا لَيْسَ لَكَ بِهٖ عِلْمٌ ؕ اِنَّ السَّمْعَ وَالْبَصَرَ
وَالْفُؤَادَ كُلُّ اُولٰٓئِكَ كَانَ عَنْهُ مَسْـُٔوْلًا ﴿٣٦﴾

आणि ज्या गोष्टीची तुला कल्पना नसेल, त्या गोष्टीच्या मागे लागू नकोस[८]; कारण की कान आणि डोळे आणि हृदय यांच्यातून प्रत्येकाशी विचारपूस होणार आहे[९]. (३६)

وَلَا تَمْشِ فِى الْاَرْضِ مَرَحًا ۚ اِنَّكَ لَنْ تَخْرِقَ
الْاَرْضَ وَلَنْ تَبْلُغَ الْجِبَالَ طُوْلًا ﴿٣٧﴾

आणि जमिनीवर ऐटून चालू नकोस; न तर तू जमिनीला फाडू शकतो, न उंचीत पर्वतांपर्यंत पोहचू शकतोस[१०] (३७)

كُلُّ ذٰلِكَ كَانَ سَيِّئُهٗ عِنْدَ رَبِّكَ مَكْرُوْهًا ﴿٣٨﴾

या सर्व कामाचे वाईटपणा तुझ्या पालनकर्त्याजवळ (फारच) नापसंत आहेत[११] (३८)

ذٰلِكَ مِمَّآ اَوْحٰٓى اِلَيْكَ رَبُّكَ مِنَ الْحِكْمَةِ ؕ وَلَا تَجْعَلْ
مَعَ اللّٰهِ اِلٰهًا اٰخَرَ فَتُلْقٰى فِىْ جَهَنَّمَ مَلُوْمًا مَّدْحُوْرًا ﴿٣٩﴾

हे पण त्याच 'वह्या'कडून आहे, जे तुझ्या पालनकर्त्याने, तुझ्याकडे आपल्या हिकमतने उतारले आहे. तर अल्लाहबरोबर आणखी कोणाला उपास्य बनवू नकोस, की, दोषास पात्र होऊन, आणि ईश्वरी कृपेकडून दुरावला जाऊन, नरकाग्नीत टाकून दिला जावा (३९)

اَفَاَصْفٰىكُمْ رَبُّكُمْ بِالْبَنِيْنَ وَاتَّخَذَ مِنَ الْمَلٰٓئِكَةِ
اِنَاثًا ؕ اِنَّكُمْ لَتَقُوْلُوْنَ قَوْلًا عَظِيْمًا ﴿٤٠﴾

काय मुलांकरीता, अल्लाहने तुम्हास निवडून घेतले, आणि स्वत: आपल्याकरीता, देवदुतांना मुली म्हणून बनवून घेतले? नि:संशय तुम्ही फार मोठा बोल बोलत आहात! (४०)

१) हे महावाक्य सू.अन्आम – १५१ मध्ये सुद्धा येऊन चुकले आहे. हदीसीमध्ये येते की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी, 'शिर्क' च्या नंतर ज्या गुन्ह्याला, सर्वांत मोठा ठरविला आहे, तो हाच आहे की, ''की तू आपल्या संततीला, या भीतीने ठार करशील की, ती तुझ्या बरोबर खाईल.'' (स.बुखारी, तफसीर सू.बकर: स.मुस्लीम, ) आजकाल, संततीला ठार करण्याचा मोठा गुन्हा, फारच व्यवस्थित रित्या, आणि कुटूंब नियोजनाच्या गोंडस नावाखाली, साऱ्या जगात होत आहे. आणि पुरूषवर्ग, ''उत्कृष्ट शिक्षण आणि संगोपण'' च्या नांवावर, आणि स्त्रीयांआपल्या सौंदर्याला कायम ठेवण्यासाठी, हा गुन्हा करीत आहेत. (अल्लाह यापासून आमचे संरक्षण करो)

२) इस्लाममध्ये, व्याभिचार कारण की, फार मोठा गुन्हा आहे, इतका मोठा की, कोणी विवाहीत पुरूष किंवा स्त्री हा गुन्हा करून टाकेल, तर त्याला इस्लामी समाजात जिवंत राहण्याचाच हक्क नाही. मग त्याला तलवारीच्या एका वाराने, मारून टाकणे ही पुरेसे नाही; किंबहुना हुकूम आहे की, त्याला दगड मारून मारून, त्याचे जीवन संपवून टाकावे; की तो समाजात धडा घेण्यासारखा होऊन जांवा. म्हणून येथे फर्माविले की, व्याभिचाराच्या जवळ जाऊं नका. म्हणजे त्याच्या इच्छे आणि सबबीपासून सुद्धा वाचून रहा. उदाहरणार्थ, पर स्त्रीला पहाणे, त्यांच्याशी एकात व संभाषणाचे मार्ग निर्माण करणे, अशाच प्रकारचे स्त्रीयांचे बेपर्दा, आणि शृंगार करून घराबाहेर निघणे, वगैरे या सर्व कामांपासून वांचणे आवश्यक आहे. कारण की, या निर्लज्जपणापासून वाचणे शक्य व्हावे.

३) हक्काबरोबर ठार करण्याचा अर्थ 'किसास' (बदला) मध्ये ठार करणे आहे. ज्याला मानवी समाजाच्या जीवनाचा आणि सुख शांतीला, कारणीभूत ठरविण्यात आले आहे. अशाच प्रकारे विवाहीत व्याभिचाऱ्याला आणि धर्माकडून फिरून गेलेल्याला, ठार करण्याचा हुकूम आहे.

४) म्हणजे ज्याचा खुन झाला आहे, त्याच्या वारसांना हा हक्क, किंवा वर्चस्व किंवा शक्ती प्रदान करण्यात आली आहे की, त्याने खुन्याला, 'किसास' मध्ये ठार करून टाकावे. किंवा त्याच्याकडून दिय्यत (प्राणमूल्य) घेऊन घ्यावे, किंवा माफ करून टाकावे. आणि जर किसासच घेणे आहे तर त्याच्यांत अत्याचार करू नये; एकाच्या बदल्यात दोन, तीन किंवा चारना मारून टाकावे. किंवा त्याचे नाक व कान कापणे किंवा छळ करून करून मारणे. ज्याचा खून झाला आहे त्याचा वारस, मनसूर आहे म्हणजे अध्यक्षांना किंवा सत्ताधाऱ्यांना त्याची मदत करण्याची ताकीद करण्यात आली आहे. यासाठी यावर अल्लाहचे आभार मानावयांस पाहिजे. अत्याचार करून, अल्लाहचे कृतघ्न होता, कामा नये.

५) कोणाच्या जीवाला अयोग्य रित्या घेण्याला, मनाई केल्यानंतर संपत्तीला बर्बाद करण्यापासून मना करण्यात येत आहे; आणि त्यांच्यात अनाथांची संपत्ती सर्वांत जास्त महत्त्वाची आहे. म्हणून सांगितले की, अनाथांच्या सज्ञान होईपर्यंत त्यांच्या संपत्तीला अशा प्रकारे वापरा, ज्यांत त्याचा फायदा होईल. असे न व्हावे की, काहीही विचार केल्याशिवाय अशा व्यवहारांत लाऊन द्या की ती बर्बाद किंवा घाट्याची होऊन जावी. किंवा सज्ञान वयाला पोहचण्यापूर्वी तुम्ही तिला उडवून टाकावे.

६) अहेदने तो करारपण अभिप्रेत आहे, जो अल्लाह आणि त्याच्या सेवकाच्या दर्म्यान आहे आणि तो सुद्धा जो माणसे आपसांत एक दुसऱ्याशी करतात. दोन्ही प्रकारांच्या करारांचे पूर्ण करणे आवश्यक आहे. आणि करारभंग केल्यास, त्याची विचारपूस होईल.

७) पुण्य प्रतिफलाच्या अनुषंगाने, उत्तम आहे. याशिवाय लोकांमध्ये आपल्या विषयी विश्वास निर्माण करण्यासाठी सुद्धा मापातोलात प्रामाणिकपणा, फायदेकारक आहे.

८) 'कफा यक्फु' चा अर्थ आहे मागे लागणे; म्हणजे ज्या गोष्टीचे ज्ञान नाही, त्याच्या मागे लागू नका. म्हणजे चुकीच्या धारणा करू नका. कोणाचे दोष शोधण्यात राहू नका. अशाचप्रकारे ज्या गोष्टीचे ज्ञान नाही, त्यावर अंमलबजावणी करू नका.

९) म्हणजे ज्या गोष्टीच्या मागे तुम्ही लागाल, त्याच्यासंबंधी कानाला प्रश्न केला जाईल. की काय याने ऐकले होते, डोळ्यांना प्रश्न केला जाईल, काय त्यांनी पाहिले होते, आणि मनाला प्रश्न केला जाईल, काय त्याने जाणले होते? कारण की, हीच तीन ज्ञान मिळवण्याची साधने आहेत. म्हणजे या अवयवांना, अल्लाहतआला, कयामतच्या दिवशी, बोलण्याची क्षमता प्रदान करेल, आणि त्यांना विचारण्यांत येईल.

१०) शेखीने आणि ऐटित चालणे, अल्लाहला फारच नापसंत आहे. कारूनला याच आधारावर त्याचे घर आणि खजिन्यासह, जमिनीत धसवून देण्यात आले. (सू.कसस - ८१) हदीसमध्ये येते, ''एक मनुष्य दोन चादरी ओढून, ऐटित चालत होता, तर त्याला जमिनीत धसवून देण्यात आले, आणि तो कयामतपर्यंत धसत चालला जाईल.'' (स.मुस्लिम) अल्लाहतआलाला विनय आणि विनम्रता पसंत आहे. अल्लाहतआला विनय आणि विनम्रता बाळगणाऱ्यांना उंच दर्जा देतो.

११) म्हणजे ज्या गोष्टी सांगण्यात आल्या, त्यांच्यांत ज्या वाईट आहेत, ज्यापासून मना करण्यात आले आहे, ती नापसंत आहेत.

وَلَقَدۡ صَرَّفۡنَا فِیۡ هٰذَا الۡقُرۡاٰنِ لِیَذَّکَّرُوۡا ؕ وَمَا یَزِیۡدُهُمۡ اِلَّا نُفُوۡرًا ﴿۴۱﴾

आणि आम्ही तर या कुरआनांत, नाना प्रकारे समजाविले[1] की, लोकांनी समजून जावे. परंतु यावर पण त्यांचा दुराग्रह वाढतच गेला (४१)

قُلۡ لَّوۡ کَانَ مَعَهٗۤ اٰلِهَۃٌ کَمَا یَقُوۡلُوۡنَ اِذًا لَّابۡتَغَوۡا اِلٰی ذِی الۡعَرۡشِ سَبِیۡلًا ﴿۴۲﴾

(आपण) सांगून टाका की, जर अल्लाहबरोबर आणखी उपास्य पण असते, जसे की, हेच लोक म्हणतात, तर जरूर त्यांनी आतापर्यंत, महासिंहासनाच्या मालकापर्यंत, मार्ग शोधून काढला असता[2] (४२)

سُبۡحٰنَهٗ وَتَعٰلٰی عَمَّا یَقُوۡلُوۡنَ عُلُوًّا کَبِیۡرًا ﴿۴۳﴾

जे काही हे म्हणतात, त्यापासून तो पवित्र आणि थोर, फार दूर आणि फार उच्च आहे[3]. (४३)

تُسَبِّحُ لَهُ السَّمٰوٰتُ السَّبۡعُ وَالۡاَرۡضُ وَمَنۡ فِیۡهِنَّ ؕ وَاِنۡ مِّنۡ شَیۡءٍ اِلَّا یُسَبِّحُ بِحَمۡدِهٖ وَلٰکِنۡ لَّا تَفۡقَهُوۡنَ تَسۡبِیۡحَهُمۡ ؕ اِنَّهٗ کَانَ حَلِیۡمًا غَفُوۡرًا ﴿۴۴﴾

सात आकाश आणि पृथ्वी, आणि जे पण यांच्यात आहे, ते सर्व त्याची पवित्रता वर्णन करतात; अशी कुठलीही वस्तू नाही जी त्याच्या पवित्रता आणि स्तुती बरोबर त्याचे नामस्मरण करीत नसेल; हां! हे खरे आहे की, तुम्ही त्यांचे गुणगाण समजूंशकत नाही[4]; तो मोठा दर्याद्र आणि क्षमाकर्ता आहे. (४४)

وَاِذَا قَرَاۡتَ الۡقُرۡاٰنَ جَعَلۡنَا بَیۡنَکَ وَبَیۡنَ الَّذِیۡنَ لَا یُؤۡمِنُوۡنَ بِالۡاٰخِرَۃِ حِجَابًا مَّسۡتُوۡرًا ﴿۴۵﴾

आणि तू जेव्हा कुरआन वांचतोस, आम्ही तुझ्यात आणि त्या लोकांच्या दर्म्यान, जे परलोकावर विश्वास ठेवत नाही, एक गुप्त पर्दा टाकून देतो[5] (४५)

وَّجَعَلۡنَا عَلٰی قُلُوۡبِهِمۡ اَکِنَّۃً اَنۡ یَّفۡقَهُوۡهُ وَفِیۡۤ اٰذَانِهِمۡ وَقۡرًا ؕ وَاِذَا ذَکَرۡتَ رَبَّکَ فِی الۡقُرۡاٰنِ وَحۡدَهٗ وَلَّوۡا عَلٰۤی اَدۡبَارِهِمۡ نُفُوۡرًا ﴿۴۶﴾

आणि त्यांच्या अंत:करणावर आम्ही परदे टाकून दिले आहेत, यापासून की त्यांनी समजावे; आणि त्यांच्या कानांत भार; आणि जेव्हा तू फक्त अल्लाहचेच नामस्मरण, त्याच्या एकच होण्यासह, या कुरआनात करीत असतोस, तर ते तोंड फिरवीत, पाठ फिरवून पळ काढतात[6] (४६)

نَحۡنُ اَعۡلَمُ بِمَا یَسۡتَمِعُوۡنَ بِهٖۤ اِذۡ یَسۡتَمِعُوۡنَ اِلَیۡکَ وَاِذۡ هُمۡ نَجۡوٰۤی اِذۡ یَقُوۡلُ الظّٰلِمُوۡنَ اِنۡ تَتَّبِعُوۡنَ اِلَّا رَجُلًا مَّسۡحُوۡرًا ﴿۴۷﴾

त्यांच्या ऐकतेवेळी, त्यांच्या दिली इराद्याला आम्ही खूप जाणतो; जेव्हा ते आपल्याकडे कान लावून असतात, तेव्हासुद्धा; आणि जेव्हा हे सल्लामसलत करीत असतात, तेव्हासुद्धा; जेव्हा की हे जालीम म्हणत असतात की, आपण त्याच्या आज्ञापालनांत लागून राहिले आहात, ज्याच्यावर जादू[7] करून देण्यांत आला आहे (४७)

اُنۡظُرۡ کَیۡفَ ضَرَبُوۡا لَکَ الۡاَمۡثَالَ فَضَلُّوۡا فَلَا یَسۡتَطِیۡعُوۡنَ سَبِیۡلًا ﴿۴۸﴾

पहा बरे! ते आपणांसाठी कशा कशा उपमा देतात. बस ते बहकत चालले जात आहेत; आतातर (सरळ) मार्ग धरणे, यांच्या आवाक्यात राहिले नाही[8]. (४८)

وَقَالُوۡۤا ءَاِذَا کُنَّا عِظَامًا وَّرُفَاتًا ءَاِنَّا لَمَبۡعُوۡثُوۡنَ خَلۡقًا جَدِیۡدًا ﴿۴۹﴾

आणि त्यांनी म्हटले, काय आम्ही हाडे आणि कण कण (माती) होऊन जाऊ, तर काय आम्ही नव्या निर्मितीत, पुन्हा दुसऱ्यादा उठवून उभे केले जाऊ? (४९)

१) वेगवेगळ्या प्रकारचा अर्थ आहे, प्रवचन आणि हितोपदेश, प्रमाणे आणि निशाण्या, भय आणि लालुच, आणि घटना आणि उदाहरणे, प्रत्येक प्रकारे वारंवार समजाविले गेले आहे; कारण की, त्यांनी समजून घ्यावे. परंतु ते कुफ्र आणि शिर्कच्या अंध:कारात अशा प्रकारे फसलेले आहेत की, ते सत्याच्या जवळ येण्याऐवजी, त्यापासून आणखी जास्त दूर होऊन गेलेत. यासाठी की ते समजतात हे कुरआन जादू, तंत्रमंत्र आणि काव्य आहे. मग ते या कुरआनापासून कशा प्रकारे मार्ग पकडतील? कारण की कुरआनाचे उदाहरण पावसासारखे आहे. जर सुपिक जमिनीवर पडला तर ती पावसाच्या पाण्याने हिरवीगार होऊन जाते आणि जर जमीन घाणेरडी असेल तर दुर्गंधीत वाढ होऊन जाते.

२) याचा एक अर्थ तर हा आहे की, ज्याप्रमाणे एक बादशाह, दुसऱ्या बादशाहवर धांवा बोलून वर्चस्व आणि सामर्थ्य

प्राप्त करून घेतो, अशाच प्रकारे हे दुसरे उपास्य पण, अल्लाहवर वर्चस्वाचा कोणी मार्ग शोधून काढतात, आणि आतांपर्यंत असे झाले नाही; जेव्हा की, या उपास्यांची पुजा करताना, शेंकडो वर्ष होऊन गेले आहेत. तर याचा अर्थ हा आहे की, अल्लाहशिवाय कोणी उपास्य नाही, कोणी अधिकार संपन्न व्यक्ती नाही, कोणी नफा नुकसान पोहचवणारा नाही. दुसरा अर्थ आहे की ते आतांपर्यंत अल्लाहचे सामिप्य प्राप्त करून चुकले असते, आणि मुशरिकीन, जे श्रद्धा ठेवतात की, त्यांच्यामार्फत ते अल्लाहचे सामिप्य प्राप्त करतात; त्यांना पण ते अल्लाहच्या जवळ करून चुकले असते.

३) म्हणजे वास्तविकता ही आहे की, हे लोक अल्लाहच्या बाबतीत जे म्हणतात की, त्याचे सरकतदार आहेत, अल्लाहतआला या गोष्टींपासून पवित्र आणि फार थोर आहे. ''प्रत्येक वस्तु या गोष्टीवर प्रामाण्य आहे की, अल्लाहतआला एक आहे.'' परंतु खरी गोष्ट पहिलीच आहे की, पावित्र्य वर्णन करणे, आपल्या वास्तविक अर्थांत आहे.

४) म्हणजे सर्व त्याचेच आज्ञांकीत, आणि आपल्या आपल्या पद्धतीने त्याचे पावित्र्य आणि स्तुती वर्णन करण्यात व्यस्त आहेत. जरी आम्ही, त्यांच्या पावित्र्य आणि स्तुती वर्णन करण्याला समजत नसू. याचे समर्थन, आणखी काही कुरआनाच्या महावाक्यांनी पण होते. उदाहरणार्थ, ह.दाऊद عليه السلام च्या बाबतीत येते, ''आम्ही पर्वतांना दाऊदच्या ताब्यांत करून दिले. यास्तव ते संध्याकाळी आणि सकाळी, त्याच्या बरोबर अल्लाहची पवित्रता वर्णन करीत असतात.'' (सू.स्वाद - १८) काही दगडांच्या बाबतीत अल्लाहतआलाने फर्माविले, ''आणि काही अल्लाहच्या भयाने कोसळून पडतात.'' (सू.बकर : - ७४) काही सहाबा (رضي الله عنه) सांगतात की, ते रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमबरोबर जेवण करीत होते की, त्यांनी जेवणांतून अल्लाहचे पावित्र्य वर्णन ऐकले.'' (स.बुखारी किताबुल मनाकिब क्र.३५७१) एका आणखी हदीशीने सिद्ध आहे की, मुंग्या अल्लाहचे पावित्र्य वर्णन करतात. (बुखारी क्र.३०१९. मुस्लिम क्र.१७५९) अशा प्रकारे, ज्या खोडाला टेक लावून, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम खुतबा देत असत, जेव्हा लाकडाचे मिम्बर बनून झाले आणि आपण ﷺ नी त्याला सोडून दिले, तेव्हा लहान मुलासारखा रडण्याचा आवाज त्याच्यांतून येत होता. (स.बुखारी क्र.३५८३) मक्केत एक दगड होता, जो रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला सलाम करीत असे. (स.मुस्लीम क्र.१७८२) या महावाक्यांनी आणि सहीह हदीशींनी हे स्पष्ट आहे की निर्जीव वस्तू आणि वनस्पतीमध्ये सुद्धा, एक विशिष्ट प्रकारची समज उपस्थित आहे; ज्याला आम्ही जरी समजू शकत नसलो; तरी त्यांच्यात अशी समज असल्याने ते अल्लाहचे पावित्र्य वर्णन करीत असतात. काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत पावित्र्य वर्णन करण्याचे प्रमाण आहे. म्हणजे या वस्तू या गोष्टीला प्रमाण आहेत की, संपूर्ण ब्रम्हांडाचा निर्माता, आणि प्रत्येक वस्तूवर समर्थ फक्त अल्लाहतआला आहे.

५) मस्तूर म्हणजे पर्दा टाकणारा (आड किंवा दर्म्यानमध्ये येणारा) आहे. किंवा डोळ्यापासून अदृश्य. ते त्याला पाहत नाही. यांच्याबरोबर, त्यांच्यात आणि हिदायतच्या दर्म्यान पर्दा आहे

६) 'अकिन्नतुन' 'किनान' चे अनेकवचन आहे. असा पर्दा जो अंत:करणांवर पडून जावा. 'वक्र' कानामध्ये असा बोळा (डाट) जो कुरआनाच्या ऐकण्यात आड यावा. अर्थ हा आहे की त्यांची अंत:करणे, कुरआनाच्या समजण्याला असमर्थ, आणि कान कुरआन ऐकून, हिदायत कबूल करण्याला लाचार आहेत. आणि अल्लाहच्या एक होण्याने (तौहिद) तर त्यांना इतका तिटकारा आहे की, त्याला ऐकून पळच काढतात.

७) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला ते जादुने पिडीत समजतात; आणि असे समजत असल्यामुळे, कुरआन ऐकत,आणि आपसात खलबते करतात. म्हणून हिदायतपासून वंचित्च राहतात.

८) कधी जादूगिर, कधी जादुने पिडीत, कधी वेडा, आणि कधी तांत्रिक (मांत्रिक) म्हणतात. बस, अशाप्रकारे मार्गभ्रष्ट होत आहेत. हिदायतचा मार्ग त्यांना कशा तऱ्हेने मिळणार?

قُلْ كُونُوا حِجَارَةً أَوْ حَدِيدًا ۝٥٠

**उत्तर द्या की, तुम्ही दगड बनून जा किंवा लोखंड[१] ५०**

أَوْ خَلْقًا مِّمَّا يَكْبُرُ فِي صُدُورِكُمْ ۚ فَسَيَقُولُونَ مَن يُعِيدُنَا ۖ قُلِ الَّذِي فَطَرَكُمْ أَوَّلَ مَرَّةٍ ۚ فَسَيُنْغِضُونَ إِلَيْكَ رُءُوسَهُمْ وَيَقُولُونَ مَتَىٰ هُوَ ۖ قُلْ عَسَىٰ أَن يَكُونَ قَرِيبًا ۝٥١

**किंवा आणखी कोणी अशी निर्मिती, जी तुमच्या मनाला फारच कठीण वाटत असेल[२]; मग ते विचारतील की, कोण आहे जो दुसऱ्यादा आमचे जीवन परत करेल? आपण उत्तर देऊन टाका की, तोच अल्लाह, ज्याने तुम्हाला पहिल्यादा निर्माण केले; यावर ते आपली डोकी, हलवून हलवून आपणांस[३] विचारतील की, बरे! हे आहे केव्हा? तर आपण उत्तर द्या की, कदाचित, ती (घटका) जवळच येऊन पोहचली असेल[४] ५१**

يَوْمَ يَدْعُوكُمْ فَتَسْتَجِيبُونَ بِحَمْدِهِ وَتَظُنُّونَ إِن لَّبِثْتُمْ إِلَّا قَلِيلًا ۝٥٢

**ज्या दिवशी तो तुम्हास बोलावील[५], तुम्ही त्याचे गुणगाण करीत, त्याच्या हुकूमाची अंमलबजावणी कराल. आणि अशी कल्पना कराल की, तुम्ही फारच थोडे दिवस राहिला आहात[६] ५२**

وَقُل لِّعِبَادِي يَقُولُوا الَّتِي هِيَ أَحْسَنُ ۚ إِنَّ الشَّيْطَانَ يَنزَغُ بَيْنَهُمْ ۚ إِنَّ الشَّيْطَانَ كَانَ لِلْإِنسَانِ عَدُوًّا مُّبِينًا ۝٥٣

**आणि माझ्या सेवकांना सांगून द्या की, त्यांनी फारच चांगली गोष्ट तोंडातून काढत जावी[७]. कारण की, शैतान आपसात फिसाद टाकत असतो[८]; नि:संशय, शैतान माणसाचा खुल्लम खुल्ला शत्रू आहे. ५३**

१) जे माती आणि हाडकांहून फारच कठीण आहे; आणि ज्यांच्यात जीवनाची लक्षणे निर्माण करणे जास्त मुश्किल आहे.
२) म्हणजे याच्यापेक्षा सुद्धा जास्त कठीण वस्तूं, जी तुम्हास ठाऊक असेल, ती बनून जा. आणि मग विचारा की, कोण जिवंत करेन?
३) 'अन्गज'; 'युनगजू' च्या अर्थांत आहे, म्हणजे डोके हलविणे. म्हणजे टिंगल म्हणून डोके हलवून ते म्हणतील की, हे दुसऱ्यादा जीवन केव्हा होईल ?
४) जवळचा अर्थ आहे, घडून येणारी गोष्ट, 'प्रत्येक घडणारी घटना, जवळ आहे.' आणि 'असा' पण कुरआनामध्ये अवश्य आणि खात्रीपूर्वक घडण्याच्या अर्थांत उपयोगांत आणला गेला आहे. म्हणजे कयामतचे घडून येणे खात्रिपूर्वक आणि नक्की आहे.
५) 'बोलावील' चा अर्थ आहे, कबरींमधून जिवंत करून, आपल्या समक्ष उभा करील, तुम्ही त्याचे गुणगाण गात, त्याच्या हुकूमाची अंमलबावणी कराल, किंवा त्याला ओळखत त्याच्याजवळ हजर होऊन जाल.
६) तेथे हे ऐहिक जीवन फारच थोडे वाटेल. ''जेव्हा कयामतला पाहून घेतील, तर जगांतले जीवन त्यांना असे वाटेल, जणू त्यांत एक संध्याकाळ किंवा एक सकाळ राहिले आहेत.'' (सू.नाजियात-४६) याच विषयाला दुसऱ्या ठिकाणीपण सांगण्यांत आले आहे. उदाहरणार्थ सू.ताहा १०२ ते १०४, सू.रुम-५५, सू.मोमिनुन-११२ ते ११४. काही म्हणतात की, पहिला सूर फुंकला जाईल तर सर्व मृत कबरींमध्ये जिवंत होऊन जातील. मग दुसरा सूर फुंकला जाईल तेव्हा हशरच्या मैदानांत हिशेबासाठी एकत्रित होतील. दोन सुरांतील अंतर चाळीस वर्षांचे असेल. आणि या अंतरांत त्यांना कुठलीही शिक्षा दिली जाणार नाही. ते झोपून जातील; दुसऱ्या सूर फुंकण्यावर उठतील तर म्हणतील, ''अरेरे! आम्हाला आमच्या झोपेतून कोणी उठविले आहे?'' (सू.यासीन - ५२) (फत्हुल कदीर) पहिली गोष्ट जास्त बरोबर आहे.
७) म्हणजे आपसात संभाषण करतांना, जिभेला व्यवस्थित वापरावे. चांगले बोल बोलावेत. अशाच प्रकारे काफिर, मुशरिकीन आणि ग्रंथधारी लोकांशी जर बोलण्याचा प्रसंग आला, तर त्यांच्याशी सुद्धा, मैत्रीपूर्ण आणि नर्मीच्या सुरांत संभाषण करावे.
८) जिभेच्या जराशा व्यवस्थित न बोलण्याने, शैतान जो तुमचा खुल्लम खुल्ला आणि पूर्वीपासून दुष्मण आहे, तुमच्या आपसात फिसाद टाकू शकतो. किंवा काफिर आणि मुशरिकीनच्या मनांत, तुमच्या करीता जास्त द्वेष आणि तिरस्कार निर्माण करू शकतो. हदीसमध्ये आहे, नबी ﷺ नी फर्माविले, ''तुमच्यांतून कोणीही मनुष्याने आपल्या भावा (मुसलमाना) कडे हत्याराने इशारा करू नये. यासाठी की त्याला ठाऊक नाही की, शैतान कदाचित, त्याच्या हातून हत्यार चालवून देईल. (आणि ते या मुसलमान भावाला जाऊन लागेल, ज्याच्याने त्याचा मृत्यू घडून येईल) आणि तो मग नरकाच्या खड्ड्यांत जाऊन पडेल.'' (स.बुखारी स.मुस्लीम)

رَبُّكُمْ اَعْلَمُ بِكُمْ ۭ اِنْ يَّشَاْ يَرْحَمْكُمْ اَوْ
اِنْ يَّشَاْ يُعَذِّبْكُمْ ۭ وَمَآ اَرْسَلْنٰكَ عَلَيْهِمْ وَكِيْلًا ﴿٥٤﴾

तुमचा पालनकर्ता, तुम्हाहून तुमच्यापेक्षा फारच जास्त जाणणारा आहे; तो जर इच्छील तर तुमच्यावर दया करेल, इच्छील तर शिक्षा देईल[१]; आम्ही आपणास यांचा जबाबदार ठरवून पाठविले नाही[२]. ५४

وَرَبُّكَ اَعْلَمُ بِمَنْ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۭ وَلَقَدْ
فَضَّلْنَا بَعْضَ النَّبِيّٖنَ عَلٰي بَعْضٍ وَّاٰتَيْنَا دَاوٗدَ
زَبُوْرًا ﴿٥٥﴾

आणि आकाश आणि पृथ्वीत जे काही पण आहे, तुमचा पालनकर्ता सर्वांना चांगल्या प्रकारे जाणतो. आम्ही काही पैगंबरांना, कांहीवर श्रेष्ठता दिली आहे[३]; आणि दाऊदला जबूर आम्हीच प्रदान केले आहे. ५५

قُلِ ادْعُوا الَّذِيْنَ زَعَمْتُمْ مِّنْ دُوْنِهٖ فَلَا يَمْلِكُوْنَ كَشْفَ
الضُّرِّ عَنْكُمْ وَلَا تَحْوِيْلًا ﴿٥٦﴾

सांगून द्या की, अल्लाहच्या शिवाय, ज्यांना तुम्ही उपास्य समजत आहात, त्यांना बोलवा. परंतु न तर ते, तुमच्यापासून कुठल्या त्रासाला दुर करूंशकतात, न बदलू शकतात. ५६

اُولٰۗىِٕكَ الَّذِيْنَ يَدْعُوْنَ يَبْتَغُوْنَ اِلٰى رَبِّهِمُ
الْوَسِيْلَةَ اَيُّهُمْ اَقْرَبُ وَيَرْجُوْنَ رَحْمَتَهٗ وَيَخَافُوْنَ
عَذَابَهٗ ۭ اِنَّ عَذَابَ رَبِّكَ كَانَ مَحْذُوْرًا ﴿٥٧﴾

ज्यांची हे लोक प्रार्थना करतात ते स्वत: आपल्या पालनकर्त्याच्या सामिप्यासाठी (अधिक) झटत असतात, की यांच्यातून कोण जास्त जवळ होऊन जाईल; ते स्वत: त्याच्या रहमतची आशा बाळगतात; आणि त्याच्या शिक्षेचे भय बाळगतात[४]; (गोष्ट पण हीच आहे की) तुझ्या पालनकर्त्याची शिक्षा भिण्यासारखी आहे. ५७

وَاِنْ مِّنْ قَرْيَةٍ اِلَّا نَحْنُ مُهْلِكُوْهَا قَبْلَ يَوْمِ الْقِيٰمَةِ
اَوْ مُعَذِّبُوْهَا عَذَابًا شَدِيْدًا ۭ كَانَ ذٰلِكَ فِي الْكِتٰبِ
مَسْطُوْرًا ﴿٥٨﴾

आणि जितक्या पण वस्त्या आहेत, आम्ही कयामतच्या दिवसाच्या पूर्वी पूर्वी, एक तर त्यांना नष्ट करून टाकू किंवा कठीण शिक्षा देणार आहोत. हे तर पुस्तकांत लिहून चुकले गेले आहे[५]. ५८

وَمَا مَنَعَنَآ اَنْ نُّرْسِلَ بِالْاٰيٰتِ اِلَّآ اَنْ كَذَّبَ بِهَا
الْاَوَّلُوْنَ ۭ وَاٰتَيْنَا ثَمُوْدَ النَّاقَةَ مُبْصِرَةً فَظَلَمُوْا بِهَا ۭ
وَمَا نُرْسِلُ بِالْاٰيٰتِ اِلَّا تَخْوِيْفًا ﴿٥٩﴾

आणि आम्हास चमत्कारांच्या अवतरीत करण्यास रूकावट फक्त याचीच आहे की, पूर्वीचे लोक त्यांना नाकारून चुकले आहेत[६]. आणि आम्ही समूदच्या लोकांना समज आणि इशारा व्हावा म्हणून (एक) उंटीण दिली, परंतु त्यांनी तिच्यावर जुलुम केला[७]. आणि आम्ही तर फक्त लोकांना धमकाविण्यासाठी निशाण्या पाठवित असतो. ५९

وَاِذْ قُلْنَا لَكَ اِنَّ رَبَّكَ اَحَاطَ بِالنَّاسِ ۭ وَمَا جَعَلْنَا الرُّءْيَا
الَّتِيْٓ اَرَيْنٰكَ اِلَّا فِتْنَةً لِّلنَّاسِ وَالشَّجَرَةَ الْمَلْعُوْنَةَ
فِي الْقُرْاٰنِ ۭ وَنُخَوِّفُهُمْ ۙ فَمَا يَزِيْدُهُمْ اِلَّا طُغْيَانًا كَبِيْرًا ﴿٦٠﴾

आणि आठवण करा जेव्हा की आम्ही आपणास सांगितले की, आपल्या पालनकर्त्याने, लोकांना घेरून ठेवले आहे[८]. जे आम्ही आपणास समक्ष दाखविले होते, ते लोकांसाठी फक्त (एक) परीक्षा होती. आणि अशाच प्रकारे ते झाड सुद्धा, ज्याच्यावर कुरआनांत तिरस्कार दाखविला गेला आहे. आम्ही त्यांना भिववीत आहोत, परंतु हे, त्यांच्या आणखी जास्त शिरजोरीत वाढ करीत आहे[१०]. ६०

१) जर मुशरिकीनला संबोधित करावयाचे असेल, तर दयेचा अर्थ, इस्लाम कबुल करण्याच्या सुबुद्धी, असा होईल. आणि शिक्षेने अभिप्रेत, शिर्कवरच मृत्यू असा आहे; ज्यावर ते शिक्षेला पात्र होतील. आणि जर संबोधन ईमानवाल्यांशी असेल, तर दयेचा अर्थ असेल, तो काफिरांकडून तुमचे संरक्षण करेल. आणि शिक्षेचा अर्थ आहे, काफिरांचे मुसलमानांवर वर्चस्व आणि राज्य.

२) की, आपण त्यांना जरूर कुफ्रच्या दलदलीतून बाहेर काढावे; किंवा त्यांच्या कुफ्रवर जमून रहाण्याने आपली विचारपूस होईल.

३) हा विषय, ''तिलकर् रूसुल्लु फज्जल्ना बअ्जहुम् अला बअ्ज.'' (सू. बकर:-२५३) मध्ये येऊन चुकला आहे, येथे दुसऱ्यांदा मक्केच्या काफिरांच्या उत्तरांत, हा विषय दोहरविण्यांत आला आहे. जे म्हणत असत की, काय अल्लाहला पैगंबरीसाठी हा मुहम्मदच ﷺ मिळाला होता? अल्लाहतआलाने फर्माविले, कोणाला पैगंबरीसाठी निवडणे, आणि कोण्या एका पैगंबराला, दुसऱ्यावर श्रेष्ठत्व देणे, हे अल्लाहच्याच अखत्यारीत आहे.

४) सदरील महावाक्यांत, 'मिन दूनिल्लाह' ने अभिप्रेत, देवदूत, आणि बुजुर्गांची ती चित्रे, आणि पुतळे आहेत, ज्यांची

ते उपासना करीत होते. किंवा ह. उजैर किंवा ह.मसीह आहेत; ज्यांना यहूदी आणि ख्रिस्ती अल्लाहचा पुत्र म्हणत, आणि त्यांच्यात उपास्याची वैशिष्टये आहेत असे मानत. किंवा ते जिन्नात आहेत, जे मुसलमान होऊन गेले होते, आणि मुशरिकीन त्यांची उपासना करीत असत. यासाठी या महावाक्यात, दाखविण्यात येत आहे की, हे स्वत: आपल्या पालनकर्त्याचे सामिप्य प्राप्त करण्यात प्रयत्नशील रहातात; आणि त्याच्या दयेची आशा बाळगतात; आणि त्याच्या शिक्षेकडून भितात. आणि हे वैशिष्टय दगडांत असू शकत नाही. या महावाक्याने स्पष्ट होते की, मिन् दूनिल्लाह् (अल्लाहशिवाय ज्यांची इबादत केली जात राहिली आहे.) त्या फक्त दगडांच्या मुर्त्याच नव्हत्या, परंतु अल्लाहचे सेवक पण होते, ज्यांच्यातून काही देवदूत, काही नेक लोक, काही पैगंबर आणि काही जिन्न होते. अल्लाहतआलाने सर्वांच्या बाबतीत सांगितले की, ते काही करू शकत नाही; न कोणाची स्थिती बदलू शकतात. ''आपल्या पालनकर्त्याचे सामिप्य मिळविण्यात प्रयत्नशील असतात.'' चा अर्थ चांगल्या कर्मांच्या मार्फत, अल्लाहचे सामिप्य शोधतात. हेच उपास्यत्व अलवसीला आहे ज्याला कुरआनाने सांगितले आहे; ते नाही ज्याला कबर पुजक सांगतात की, मृत पावलेल्या व्यक्तींच्या नांवाचा नवस फेडा; त्यांच्या कबरीवर चादरी चढवा; आणि तेथे मेळे भरवा; आणि त्यांच्या जवळ मदत आणि दाद मागा; कारण की हा वसीला नाही, ही तर त्यांची उपासना आहे, जी शिर्क आहे. अल्लाहतआला यापासून तमाम मुसलमानांना सुरक्षित ठेवो! (आमीन)

५) पुस्तकाने अभिप्रेत लौहे महफूज आहे. अर्थ हा आहे की, अल्लाहतआलाकडून ही गोष्ट नक्की झालेली आहे, जी लौहे महफूज मध्ये, लिहलेली आहे की, आम्ही काफिरांच्या प्रत्येक वस्तीला, एक तर मृत्यूने नष्ट करून टाकू, आणि वस्तीने अभिप्रेत वस्तीचे राहणारे आहेत. आणि नष्ट करण्याचे कारण त्यांचे कुफ्र व शिर्क आणि जुलूम आणि अत्याचार आहेत. याशिवाय हे नष्ट करणे कयामतच्यापूर्वी घडून येईल; नाहीतर कयामतच्या दिवशी तर, कुठलाही भेदभाव केल्याशिवाय, प्रत्येक वस्तीच, उध्वस्त आणि नाश होण्याला बळी पडेल.

६) हे महावाक्य त्या वेळी अवतरीत झाले, जेव्हा मक्केच्या काफिरांनी मागणी केली कि 'सफा' पर्वताला सोन्याचा बनवून दिला जावा. किंवा मक्केच्या डोंगरांना तेथून हटवून दिले जावे; कारण की तेथे शेती करणे शक्य व्हावे. ज्यावर अल्लाहतआलाने जिब्रईलच्या मार्फत संदेश पाठविला की, आम्ही त्यांच्या मागण्या पूर्ण करण्यास तयार आहोत. परंतु याच्यानंतर सुद्धा त्यांनी ईमान आणले नाही, तर त्यांचे नष्ट होणे खात्रीचे आहे. मग त्यांना अवकाश दिला जाणार नाही. नबी ﷺ नी पण याच गोष्टीला पसंत केले की, त्यांच्या मागण्या पूर्ण केल्या जाऊं नयेत; कारण की ते खात्रीने होणाऱ्या बर्बादीपासून वांचून जातील. (मुसनद अहमद) या महावाक्यात पण अल्लाहतआलाने हाच विषय वर्णन केला आहे की, त्यांच्या इच्छेप्रमाणे निशाण्या उतारून देणे, आमच्यासाठी काही कठीण काम नाही; पण आम्ही याला यासाठी टाळत आहोत की, पहिल्या लोकांनी पण आपल्या इच्छेप्रमाणे निशाण्या मागितल्या, ज्या त्यांना दाखवून देण्यात आल्या. परंतु असे असून सुद्धा त्यांनी खोटे ठरविले, आणि ईमान आणले नाही. ज्याच्या परिणामात ते नष्ट करून टाकण्यात आले.

७) समूदच्या लोकांचा एक उदाहरण म्हणून उल्लेख केला; कारण की त्यांच्या इच्छेवर, दगडाच्या एका शिळेतून, उंटीण जाहीर करून दाखविण्यात आली होती. परंतु त्या जालिमांनी, ईमान आणण्या ऐवजी, त्या उंटीणीलाच मारून टाकले. ज्यावर तीन दिवसानंतर, त्यांच्यावर शिक्षा येऊन पोहचली.

८) म्हणजे लोक अल्लाहच्या वर्चस्वांत आणि कबज्यांत आहेत. आणि अल्लाह जे इच्छील तेच होईल न की ते, जे ते इच्छीतील. किंवा अभिप्रेत मक्कावाले आहेत की, ते अल्लाहच्या अखत्यारीखाली आहेत. आपण निर्भय होऊन, पैगंबरीचा प्रचार करा. ते आपले काहीच बिघाडू शकणार नाही. आम्ही त्यांच्यापासून आपले संरक्षण करू. किंवा बद्रच्या युद्धाच्यावेळी किंवा मक्केच्या विजयाच्या वेळी, ज्याप्रमाणे अल्लाहने मक्केच्या काफिरांना, धडा घ्यावा अशा पराभवाला तोंड द्यावे लागले, त्याला स्पष्ट करण्यांत येत आहे.

९) सहाबा आणि ताबेईन ने या रुईयाचे भाष्य प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेली वस्तुस्थिती असे केले आहे. आणि याच्याने अभिप्रेत मेअराजचा प्रसंग आहे, जो पुष्कळशा कमजोर लोकांच्या फित्न्याला कारणीभूत ठरला. आणि ते मुरतद् (धर्माकडून फिरून गलेले) होऊन गेले. आणि झाडाने अभिप्रेत निवडुंगाचे झाड आहे. ज्याला नबी ﷺ नी मेअराजच्या रात्री प्रत्यक्ष जहन्नममध्ये पाहिले. 'अल्मल्अुनता' ने अभिप्रेत खाणाऱ्यांवर म्हणजे नर्कवासियांवर शाप. जसे दुसऱ्या ठिकाणी आहे ''निवडुंगाचे झाड नर्कवासियांचे जेवण आहे.'' (सू.दुखान ४३,४४)

१०) म्हणजे काफिरांच्या मनांत जो द्वेष आणि तिटकारा आहे, त्याच्यामुळे निशाण्या पाहून सुद्धा,ईमान आणण्याऐवजी, त्यांच्या शिरजोरी आणि दंडेलीत, आणखी वाढ होऊन जाते.

وَاِذْ قُلْنَا لِلْمَلٰٓئِكَةِ اسْجُدُوْا لِاٰدَمَ فَسَجَدُوْٓا اِلَّآ اِبْلِيْسَ ؕ قَالَ ءَاَسْجُدُ لِمَنْ خَلَقْتَ طِيْنًا ﴿٦١﴾

आणि जेव्हा आम्ही देवदूतांना हुकूम दिला की, आदमला सज्दा करा, तर इब्लीस शिवाय सर्वांनी केला. त्याने म्हटले की, काय मी त्याला सज्दा करू, ज्याला तू मातीतून निर्माण केले आहेस ६१

قَالَ اَرَءَيْتَكَ هٰذَا الَّذِيْ كَرَّمْتَ عَلَيَّ ؗ لَئِنْ اَخَّرْتَنِ اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ لَاَحْتَنِكَنَّ ذُرِّيَّتَهٗٓ اِلَّا قَلِيْلًا ﴿٦٢﴾

बरे पहा तर खरे, त्याला तू माझ्यावर श्रेष्ठत्व तर दिले आहे; परंतु जर मलाही तू कयामतपर्यंत ढिल दिली, तर मी याच्या संततीला, थोड्याशा लोकांशिवाय, आपल्या कह्यांत[१] आणून घेईन ६२

قَالَ اذْهَبْ فَمَنْ تَبِعَكَ مِنْهُمْ فَاِنَّ جَهَنَّمَ جَزَآؤُكُمْ جَزَآءً مَّوْفُوْرًا ﴿٦٣﴾

(अल्लाहतआलाने) फर्माविले की जा! यांच्यातून जो पण तुझ्या अंकीत होऊन जाईन, तर तुम्हा सर्वांची शिक्षा जहन्नम आहे, जो पुरे पुर बदला आहे. ६३

وَاسْتَفْزِزْ مَنِ اسْتَطَعْتَ مِنْهُمْ بِصَوْتِكَ وَاَجْلِبْ عَلَيْهِمْ بِخَيْلِكَ وَرَجِلِكَ وَشَارِكْهُمْ فِي الْاَمْوَالِ وَالْاَوْلَادِ وَعِدْهُمْ ؕ وَمَا يَعِدُهُمُ الشَّيْطٰنُ اِلَّا غُرُوْرًا ﴿٦٤﴾

आणि यांच्यातून तर ज्यांना पण तू आपल्या आवाजाने बहकवू शकशील, बहकवून[२] घे. आणि त्यांच्यावर आपले स्वार, पायदळ यांच्यावर चढव[३]. आणि त्यांच्या संपत्ती आणि संततीतून आपली पण भागीदारी कर[४]. त्यांना (खोटे खोटे) वायदे[५] दे. यांच्याशी जेवढे पण वायदे शैतानाचे असतात. सर्वच्या सर्व निव्वळ फसवणूक असते[६] ६४

اِنَّ عِبَادِيْ لَيْسَ لَكَ عَلَيْهِمْ سُلْطٰنٌ ؕ وَكَفٰى بِرَبِّكَ وَكِيْلًا ﴿٦٥﴾

नि:संशय माझ्या खऱ्या सेवकांवर तुझा काही काबू आणि जोर चालणार नाही[७]; आणि तुझा पालनकर्ता कार्यसाधक म्हणून पुरेसा आहे[८]. ६५

१) म्हणजे याच्यावर वर्चस्व प्राप्त करून घेईल. आणि त्याला जसे इच्छील तसे मार्ग भ्रष्ट करून टाकेन. तथापि थोडेसे लोक माझ्या डांवातून वाचून जातील. आदम आणि इब्लीसची ही गोष्ट याच्यापूर्वी सू.बकर:, सू.अअराफ, सू.हिज्र मध्ये येऊन चुकली आहे. येथे चवथ्यांदा याला सांगण्यात येत आहे. याशिवाय, सू.कहफ, सू.ताहा आणि सू. स्वाद मध्ये पण याचा उल्लेख येईल.

२) आवाजने अभिप्रेत फसवणुकीचे आमंत्रण किंवा गाणे, संगीत किंवा खेळ तमाशाची दुसरी साधने आहेत; ज्यांच्यामार्फत शैतान भरपूर लोकांना मार्गभ्रष्ट करीत आहे. याचप्रमाणे कव्वाली आहे. ज्यामुळे अज्ञानी लोकांनी मार्गभ्रष्ट केले जाते.

३) या लष्कराने अभिप्रेत, माणसे आणि जिन्न यांचे स्वार आणि पायदळ सैन्य आहे, जे शैतानाचे चेले आणि त्याच्या शिकार साधनांनी केलेल्या शिकारी आहेत. आणि शैतानाप्रमाणेच माणसांना मार्गभ्रष्ट करतात. किंवा अभिप्रेत आहे ते प्रत्येक शक्य साधन, जे शैतान मार्गभ्रष्ट करण्यासाठी, उपयोगात आणत असतो

४) संपत्तीमध्ये शैतानाच्या भागीदारी करण्याचा अर्थ, निषीद्ध मार्गाने संपत्ती कमविणे आणि निषीद्ध पद्धतीने खर्च करणे. आणि अशाच पक्रारे जनावरांना मूर्तींच्या नांवावर सोडून देणे. उदाहरणार्थ, बहीरा, साईबा, वगैरे. आणि संततीत भागीदारीचा अर्थ, व्याभिचार, अब्दुल लात, अब्दुलउज्जा वगैरे नांवे ठेवणे, गैर इस्लामी पद्धतीने त्यांचे संगोपन करणे, की ते चारित्र्य हिन आणि वाईट कर्तृत्व करणारे बनावेत. त्यांना तंगदस्तीच्या भीतीने ठार करणे किंवा जिवंत पुरून टाकणे, संततीला अग्नीपुजक, यहूदी, आणि ख्रिस्ती वगैरे बनविणे, आणि योग्य दुआ केल्याशिवाय, पत्नीशी संभोग करणे, वगैरे आहेत. या सर्व स्वरूपांत शैतानाची भागीदारी होऊन जाते.

५) की काही स्वर्ग नर्क नाहीत. किंवा मेल्यानंतर दुसऱ्यादा जीवन नाही. वगैरे.

६) 'गरूर' (फसवणुक) चा अर्थ होतो, चुकीच्या कामाला अशा प्रकारे सुशोभित करून दाखवावे की ते चांगले आणि योग्य वाटावे.

७) सेवकांचा संबंध आपल्याकडे केला, हे प्रतिष्ठा आणि मान सन्मान म्हणून आहे. ज्याच्याने ठाऊक झाले की, अल्लाहच्या खास सेवकांना बहकाविण्यांत शैतान अयशस्वी राहतो.

८) म्हणजे जो खऱ्या अर्थांत, अल्लाहचा सेवक बनून जातो, त्याच्यावर विसंबून राहतो आणि भरोसा करतो, तर अल्लाहपण त्याचा मित्र आणि कार्यसाधक बनून जातो.

رَبُّكُمُ الَّذِیْ یُزْجِیْ لَكُمُ الْفُلْكَ فِی الْبَحْرِ لِتَبْتَغُوْا مِنْ فَضْلِهٖ ؕ اِنَّهٗ كَانَ بِكُمْ رَحِیْمًا ﴿٦٦﴾

तुमचा पालनकर्ता तो आहे जो समुद्रांत तुमच्यासाठी गलबते चालवितो की तुम्ही त्याचे औदार्य (म्हणजे उदर निर्वाहाचे साधन) शोधावे; तो तुमच्यावर फारच दयाळू आहे[१]. (६६)

وَاِذَا مَسَّكُمُ الضُّرُّ فِی الْبَحْرِ ضَلَّ مَنْ تَدْعُوْنَ اِلَّاۤ اِیَّاهُ ۚ فَلَمَّا نَجّٰىكُمْ اِلَی الْبَرِّ اَعْرَضْتُمْ ؕ وَكَانَ الْاِنْسَانُ كَفُوْرًا ﴿٦٧﴾

आणि समुद्रांत संकट पोहचतात, ज्यांना तुम्ही पुकारीत होता, सर्व हरवून जातात, फक्त तोच अल्लाह बाकी राहतो. मग जेव्हा तो, तुम्हाला जमिनीकडे वाचवून घेऊन येतो, तर तुम्ही (त्याच्याकडून) तोंड फिरवून घेता. आणि मनुष्य फारच कृतघ्न आहे[२]. (६७)

اَفَاَمِنْتُمْ اَنْ یَّخْسِفَ بِكُمْ جَانِبَ الْبَرِّ اَوْ یُرْسِلَ عَلَیْكُمْ حَاصِبًا ثُمَّ لَا تَجِدُوْا لَكُمْ وَكِیْلًا ﴿٦٨﴾

तर काय तुम्ही त्याच्याकडून निर्भय होऊन गेला आहात, की तुम्हास भूपृष्ठावर धसवून टाकेन; किंवा तुमच्यावर दगड वर्षाव करणारे वादळ पाठवून देईल[३]; मग तुम्ही आपल्या करीता कोणी कैवारी पाऊ शकणार नाही. (६८)

اَمْ اَمِنْتُمْ اَنْ یُّعِیْدَكُمْ فِیْهِ تَارَةً اُخْرٰی فَیُرْسِلَ عَلَیْكُمْ قَاصِفًا مِّنَ الرِّیْحِ فَیُغْرِقَكُمْ بِمَا كَفَرْتُمْ ۙ ثُمَّ لَا تَجِدُوْا لَكُمْ عَلَیْنَا بِهٖ تَبِیْعًا ﴿٦٩﴾

काय तुम्ही या गोष्टीकडून निर्भय होऊन गेलात की, अल्लाहतआला पुन्हा तुम्हास दुसऱ्यादा समुद्राच्या प्रवासावर घेऊन येईल, आणि तुमच्यावर वेगवान आणि वादळी वाऱ्यांचे झोके पाठवून देईन; आणि तुमच्या कुफ्रमुळे तुम्हास बुडवून टाकीन. मग तुम्ही आपल्यासाठी, आमच्यावर, याचा पिच्छा करणारा कोणालाच पावणार नाही[४]. (६९)

وَلَقَدْ كَرَّمْنَا بَنِیْۤ اٰدَمَ وَحَمَلْنٰهُمْ فِی الْبَرِّ وَالْبَحْرِ وَرَزَقْنٰهُمْ مِّنَ الطَّیِّبٰتِ وَفَضَّلْنٰهُمْ عَلٰی كَثِیْرٍ مِّمَّنْ خَلَقْنَا تَفْضِیْلًا ﴿٧٠﴾

आणि खचितच आम्ही आदमच्या संततीला इज्जत आबरू दिली[५]. आणि त्यांना जमिनीवरच्या आणि पाण्याच्या स्वाऱ्या[६] दिल्यात. आणि त्यांना शुद्ध आणि चोख्या वस्तूची अन्नसंपत्ती दिली[७]. आणि आपल्या बऱ्याचशा निर्मितीवर, त्यांना श्रेष्ठता प्रदान केली[८]. (७०)

یَوْمَ نَدْعُوْا كُلَّ اُنَاسٍ بِاِمَامِهِمْ ۚ فَمَنْ اُوْتِیَ كِتٰبَهٗ بِیَمِیْنِهٖ فَاُولٰٓىِٕكَ یَقْرَءُوْنَ كِتٰبَهُمْ وَلَا یُظْلَمُوْنَ فَتِیْلًا ﴿٧١﴾

ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जमातीला तिच्या पुढाऱ्या समवेत बोलावू[९]; मग ज्यांचे पण कर्म पत्र उजव्या हाता देऊन दिले गेले, ते तर मोठ्या आवडीने आपले कर्मपत्र वाचू लागतील; आणि (एका) दोऱ्याबरोबर सुद्धा त्यांचेवर जुलूम केला जाणार नाही[१०] (७१)

وَمَنْ كَانَ فِیْ هٰذِهٖۤ اَعْمٰی فَهُوَ فِی الْاٰخِرَةِ اَعْمٰی وَاَضَلُّ سَبِیْلًا ﴿٧٢﴾

आणि जो कोणी या जगात आंधळा राहीला, तो परलोकांत पण आंधळा, आणि मार्गाहून फारच भटकलेला राहील[११] (७२)

وَاِنْ كَادُوْا لَیَفْتِنُوْنَكَ عَنِ الَّذِیْۤ اَوْحَیْنَاۤ اِلَیْكَ لِتَفْتَرِیَ عَلَیْنَا غَیْرَهٗ ۖۗ وَاِذًا لَّاتَّخَذُوْكَ خَلِیْلًا ﴿٧٣﴾

आणि हे लोक आपणास या वह्यांने, जे आम्ही आपणावर उतारले आहे, बहकवून देऊ इच्छीत होते, की, आपण याच्याशिवाय, काही आणखी ही आमच्याच नावाने (गोष्टी) घडून लावाव्यांत तेव्हा तर हे लोक, तुम्हास आपला जीवलग मित्र बनवून घेते. (७३)

وَلَوْلَاۤ اَنْ ثَبَّتْنٰكَ لَقَدْ كِدْتَّ تَرْكَنُ اِلَیْهِمْ شَیْـًٔا قَلِیْلًا ﴿٧٤﴾

आणि जर आम्ही आपणास दृढता प्रदान केली नसती, तर फारच शक्य होते की, त्यांच्याकडे तुम्ही झुकू लागला होता[१२] (७४)

اِذًا لَّاَذَقْنٰكَ ضِعْفَ الْحَیٰوةِ وَضِعْفَ الْمَمَاتِ ثُمَّ لَا تَجِدُ لَكَ عَلَیْنَا نَصِیْرًا ﴿٧٥﴾

मग तर आम्ही सुद्धा, या दुनियेत आपणास दुहेरी शिक्षा देतो; आणि दुहेरीच मृत्यूची[१३]. मग आपण तर आपल्या करीता, आमच्या मुकाबल्यात कोणी मददगार पण न पावते (७५)

१) ही त्याची कृपा आणि दयाच आहे की, त्याने समुद्राला माणसांच्या अंकीत करून दिले. आणि ते त्याच्यावर नांवा आणि गलबते चालवून, एका देशातून दुसऱ्या देशांत येतात जातात, आणि कारभार (व्यापार) करतात. तसेच त्याने त्या गोष्टींकडे मार्गदर्शन पण केले, ज्यांत सेवकांसाठी फायदे आणि चांगुलपणा आहे.

२) हा विषय पूर्वीसुद्धा, कित्येक ठिकाणी येऊन चुकला आहे.

३) म्हणजे समुद्रांत निघाल्यानंतर, तुम्ही जे अल्लाहला विसरून जातात, तर काय तुम्हास ठाऊक नाही, तो जमिनीवर पण तुमची पकड करू शकतो. तुम्हास तो जमिनीत धसवूंशकतो किंवा दगडांचा वर्षाव करून, तुम्हास नष्ट करू शकतो. ज्याप्रमाणे त्याने मागील काही लोकांना त्याने अशा प्रकारे नष्ट केले.

४) 'कासिफ' असे जोराचे वादळी वारे, जे नांवाना तोडून टाकतील. आणि त्यांना बुडवून टाकतील, 'तबीअन्' सूड घेणारा, पिच्छा करणारा. म्हणजे तुमच्या बुडून गेल्यानंतर, आम्हांस विचारेन की तूंआमच्या सेवकांना का बुडवून दिले? अर्थ हा आहे की, एक वेळा समुद्रांतून सही सलामत निघाल्यानंतर, काय तुम्हास दुसऱ्यादा समुद्रांत जाण्याची आवश्यकतांपडणार नाही? आणि तेथे तो तुम्हास, पाण्याच्या भंवऱ्यांत फसवूंशकत नाही?

५) ही प्रतिष्ठा आणि कृपा, मनुष्य होण्याच्या नात्याने, प्रत्येक मनुष्याला प्राप्त आहे. मग तो ईमानवाला असो अथवा काफिर. कारण की ही प्रतिष्ठा दुसऱ्या निर्मिती, जनावरे, दगड, आणि वनस्पती वगैरेच्या तुलनेत आहे. आणि ही प्रतिष्ठा अनेक प्रकारच्या अनुषंगाने आहे. ज्याप्रकारचे 'रंगरूप' अंगकाठी आणि चेहरा मोहरा, अल्लाहतआलाने माणसाला दिलेला आहे, तो कोण्या दुसऱ्या निर्मितीला (मखलुक) प्राप्त नाही. जी बुद्धी माणसाला दिली गेली आहे, जिच्यामार्फत त्याने आपल्या आराम आणि सुखासाठी असंख्य वस्तूं शोधून काढल्या; जनावरे वगैरे यापासून वंचित् आहेत. याशिवाय या बुद्धीने तो चूक आणि बरोबर, फायदेकारक आणि नुकसान दायक, आणि सौंदर्य व कुरुपता, याच्यांत भेदभाव करण्यास समर्थ आहे. याच बुद्धीच्या मार्फत, तो अल्लाहच्या निर्मितीपासून, फायदा उचलतो; आणि त्यांना आपल्या ताब्यांत ठेवतो. याच बुद्धीमत्तेने, तो अशा इमारती बांधतो, असे पोषाख शोधून काढतो, आणि अशा वस्तू बनवितो, ज्या त्याला उन्हाळ्याच्या उष्णतेने आणि थंडीच्या थंडाईने आणि ऋतुंच्या दुसऱ्या तिव्रतेने सुरक्षित ठेवतात. याशिवाय ब्रम्हांडाच्या तमाम वस्तुंना, अल्लाहतआलाने मनुष्याच्या सेवेत लाऊन ठेवले आहे. चंद्र, सूर्य, हवा, पाणी आणि दुसऱ्या असंख्य वस्तू आहेत, ज्यापासून मनुष्य लाभान्वयीत होत आहे.

६) जमिनीवर तो घोडे, खेचरे, गाढव, उंट आणि आपण तयार केलेल्या स्वाऱ्या, (रेल्वे, गाड्या, बसेस, विमाने, सायकल आणि मोटरसायकल वगैरे) वर स्वार होतो. आणि अशाच प्रकारे समुद्रांत नावा आणि जहाज आहेत. ज्यावर तो स्वार होतो आणि सामान आणतो, घेऊन जातो.

७) मनुष्याच्या खाद्यासाठी जे धान्य, मेवे आणि फळे, त्याने निर्माण केली आहेत, आणि त्यांच्यात ज्या चवी, स्वाद आणि शक्ती ठेवल्या आहेत. तऱ्हे तऱ्हेचे हे खाद्य, ही चवदार आणि मनपसंत फळे आणि ही शक्तीदायक आणि आनंददायक, मुरब्बे आणि पेये, आणि साखरेच्या पाकांत केलेले पदार्थ आणि मळलेले पदार्थ, मनुष्याशिवाय आणखी कोणा निर्मितीला (मुखलुकला) प्राप्त आहेत?

८) चर्चित तपशीलाने मनुष्याचे पुष्कळशा निर्मितींवर श्रेष्ठत्व आणि उच्चपद स्पष्ट आहे.

९) 'इमाम' चा अर्थ पेशवा, पुढारी आणि कायद आहे. येथे याच्याने काय अभिप्रेत आहे? यात मतभेद आहेत. काही म्हणतात याच्याने अभिप्रेत पैगंबर आहेत. म्हणजे प्रत्येक उम्मतीला तिच्या पैगंबराच्या हवाल्याने पुकारले जाईल. काही म्हणतात याच्याने आकाशी ग्रंथ अभिप्रेत आहेत, जी पैगंबराबरोबर अवतीर्ण होत आली आहेत. म्हणजे अहो तौरातवाल्यांनो! अहो इंजीलवाल्यांनो! अहो कुरआनवाल्यांनो! वगैरे म्हणून पुकारले जातील. काही म्हणतात येथे, इमामने अभिप्रेत कर्मपत्र आहे, म्हणजे प्रत्येक माणसाला जेव्हा बोलाविले जाईल तर त्याचे कर्मपत्र त्याच्या बरोबर असेल. आणि त्याच्याप्रमाणे त्याचा फैसला केला जाईल. याच मताला इमाम इब्ने कसीर आणि इमाम शौकानीने प्राधान्य दिले आहे.

१०) 'फतील' त्या पातळ आवरणाला किंवा दोऱ्याला म्हणतात जो खजुरीच्या बीत असतो; म्हणजे कणाबरोबर सुद्धा जुलूम होणार नाही.

११) अआमा (आंधळा) ने अभिप्रेत मनाचा आंधळा आहे. म्हणजे जो जगांत सत्त्याला पाहणे, समजणे आणि त्याला मान्य करण्यापासून वंचित् राहिला; तो परलोकांत आंधळा, म्हणजे पालनकर्त्याच्या खास कृपेने आणि दयेने वंचित् राहिला.

१२) यात त्या पावित्र चारित्र्याचे वर्णन आहे, जे अल्लाहकडून सर्व पैगंबर लोकांना प्राप्त होत असते. याने हे ठाऊक झाले की, मुशरिकीन जरी,नबी ﷺ ला, आपल्याकडे वळवू इच्छीत होते, परंतु अल्लाहने त्यांना ﷺ त्यांचे पासून वांचविले; आणि आपण ﷺ जरा पण त्यांच्याकडे झुकले नाहीत.

१३) याने ठाऊक झाले की, शिक्षा अल्लाहच्या हुकूमाने आणि दर्जाच्या प्रमाणे होत असते.

وَاِنْ كَادُوْا لَيَسْتَفِزُّوْنَكَ مِنَ الْاَرْضِ لِيُخْرِجُوْكَ مِنْهَا وَاِذًا لَّا يَلْبَثُوْنَ خِلٰفَكَ اِلَّا قَلِيْلًا ﴿٧٦﴾

आणि हे तर आपले पाय या भूमीतून उखडू लागलेच होते, की तिथून आपणांस काढून लावावे[१] मग पण आपल्यानंतर, हे पण कमीच थांबू शकले असते.[२] (७६)

سُنَّةَ مَنْ قَدْ اَرْسَلْنَا قَبْلَكَ مِنْ رُّسُلِنَا وَلَا تَجِدُ لِسُنَّتِنَا تَحْوِيْلًا ﴿٧٧﴾

असा दस्तुर त्यांचा होता, जे आपल्यापूर्वी आम्ही पैगंबर पाठविले[३]; आणि आपण आमच्या दस्तुरमध्ये कधी रद्दोबद्दल पावणार नाही[४] (७७)

اَقِمِ الصَّلٰوةَ لِدُلُوْكِ الشَّمْسِ اِلٰى غَسَقِ الَّيْلِ وَقُرْاٰنَ الْفَجْرِ ؕ اِنَّ قُرْاٰنَ الْفَجْرِ كَانَ مَشْهُوْدًا ﴿٧٨﴾

नमाजीला कायम करा सूर्य ढळण्यापासून रात्रीच्या अंध:कारापर्यंत[५], आणि सकाळचे कुरआन पढणे सुद्धा खचित्च सकाळच्या वेळेचे कुरआन पढणे हजर केले गेले आहे,[६] (७८)

وَمِنَ الَّيْلِ فَتَهَجَّدْ بِهٖ نَافِلَةً لَّكَ ۖ عَسٰٓى اَنْ يَّبْعَثَكَ رَبُّكَ مَقَامًا مَّحْمُوْدًا ﴿٧٩﴾

आणि रात्रीच्या काही भागांत 'तहज्जुद' च्या नमाजीत कुरआनाचे पठण करावे[७]. हे अधिकचे आपल्यासाठी[८] आहे. लवकरच आपला पालनकर्ता आपल्याला मकामे महमूदवर उभा करीन[९]. (७९)

وَقُلْ رَّبِّ اَدْخِلْنِيْ مُدْخَلَ صِدْقٍ وَّاَخْرِجْنِيْ مُخْرَجَ صِدْقٍ وَّاجْعَلْ لِّيْ مِنْ لَّدُنْكَ سُلْطٰنًا نَّصِيْرًا ﴿٨٠﴾

आणि प्रार्थना करीत जा की हे माझ्या पालनकर्त्या! मला जेथे घेऊन जाशील, चांगल्या प्रकारे घेऊन जा. आणि जेथून काढशील, चांगल्या प्रकारे काढ. आणि माझ्याकरीतांआपल्याकडून वर्चस्व आणि मदद नक्की करून दे[१०] (८०)

وَقُلْ جَآءَ الْحَقُّ وَزَهَقَ الْبَاطِلُ ؕ اِنَّ الْبَاطِلَ كَانَ زَهُوْقًا ﴿٨١﴾

आणि जाहीर करून दे की, सत्य येऊन चुकले, आणि असत्य नाहीसे झाले; खचित्च असत्य होते ही नाहीसे होणारे[११] (८१)

وَنُنَزِّلُ مِنَ الْقُرْاٰنِ مَا هُوَ شِفَآءٌ وَّرَحْمَةٌ لِّلْمُؤْمِنِيْنَ ۙ وَلَا يَزِيْدُ الظّٰلِمِيْنَ اِلَّا خَسَارًا ﴿٨٢﴾

आणि हे कुरआन जे आम्ही अवतरीत करीत आहोत, ईमानवाल्यांसाठी तर निव्वळ शिफा आणि रहमत आहे. होय! या जालीमांना नुकसानाशिवाय आणखी काही मिळणार नाही[१२]. (८२)

وَاِذَآ اَنْعَمْنَا عَلَى الْاِنْسَانِ اَعْرَضَ وَنَاٰ بِجَانِبِهٖ ۚ وَاِذَا مَسَّهُ الشَّرُّ كَانَ يَئُوْسًا ﴿٨٣﴾

आणि मनुष्यांवर जेव्हापण आम्ही आमची देणगी देतो, तेव्हा तो आपले तोंड फिरवून घेतो; आणि अंग काढून घेतो. आणि जेव्हापण त्याला कुठले संकट पोहचते, तेव्हा तो निराश होऊन जातो[१३] (८३)

قُلْ كُلٌّ يَّعْمَلُ عَلٰى شَاكِلَتِهٖ ؕ فَرَبُّكُمْ اَعْلَمُ بِمَنْ هُوَ اَهْدٰى سَبِيْلًا ﴿٨٤﴾

सांगून द्या की, प्रत्येक मनुष्य आपल्या पद्धतीने कर्मरत आहे; जो पूर्ण हिदायतच्या मार्गावर आहे, त्यांना तुमचा पालनकर्ता फार चांगल्याप्रकारे जाणतो[१४] (८४)

१) हा त्या कारस्थानाकडे इशारा आहे. जे नबी ﷺ ला मक्केहून काढण्यासाठी, मक्केच्या कुरैशांनी, तयार केले होते. ज्यापासून अल्लाहने आपणास वाचवून घेतले.

२) म्हणजे जर आपल्या योजनेप्रमाणे हे आपल्या मक्केतून काढून लावते, तर हे सुद्धा याच्यानंतर जास्त काळपर्यंत राहिले नसते. म्हणजे अल्लाहच्या शिक्षेच्या पकडीत येऊन गेले असते.

३) म्हणजे हा दस्तुर जुनाच चालत आला आहे; जो आपल्या पूर्वीच्या पैगंबरांसाठी पण वापरण्यांत आला आहे. की, जेव्हांत्यांच्या लोकांनी, त्यांना आपल्या भूमितून काढून लावले; किंवा त्यांना निघून जाण्याला भाग पाडले; तर मग ते लोकसुद्धा अल्लाहच्या शिक्षेकडून सुरक्षित राहिले नाहीत.

४) म्हणून मक्कावाल्यांबरोबर सुद्धा हेच झाले की, रसूलुल्लाह ﷺ ची हिजरत (स्वदेशत्याग) च्या दिड वर्षानंतरच, बद्रच्या मैदानांत जो धडा घेण्यासारखा अपमान आणि पराभव, त्यांना भोगावा लागला; आणि सहा वर्षानंतर, ८ हिजरीत, मक्केवर विजय मिळाला आणि या अपमान आणि पराभवानंतर, ते डोके वर करण्याच्या लायकीचे राहिले नाहीत.

५) 'दुलूक' चा अर्थ सूर्य ढळण्याचे, आणि 'गसक' चा अर्थ, अंधाराचा आहे. सूर्य ढळल्यानंतर, जोहर आणि असरची नमाज, आणि रात्रीच्या अंधारापर्यंतने अभिप्रेत, मगरीब आणि ईशाच्या नमाजी आहेत. आणि 'कुरआनल फज्र' ने

अभिप्रेत फज्रची नमाज आहे. कुरआन नमाजीच्या अर्थांत आहे. याला कुरआनाने यासाठी संबोधित करण्यांत आले आहे की, फज्रमध्ये किरात लांबलचक होते. अशाप्रकारे या महावाक्यांत पांची नमाजींचा एकत्रित उल्लेख येऊन जातो. ज्याचा तपशील हदीर्शीमध्ये मिळतो. आणि जे उम्मतच्या नेहमीच्या अंमल करण्याने पण सिद्ध आहे.
६) म्हणजे यावेळी देवदूत हजर होतात. किंबहुना दिवसाचे देवदूत आणि रात्रीचे देवदूत यांची गाठभेट होते; जसे की हदीसमध्ये आहे. (सहीह बुखारी, तफसीर सू.बनी इस्त्राईल) एका आणखी हदीसमध्ये आहे की, रात्रीचे देवदूत जेव्हांअल्लाहजवळ जातात, तेव्हा अल्लाहतआला त्यांना विचारतो, वास्तविक तो स्वत: खूप जाणतो, ''तुम्ही माझ्या सेवकांना कोणत्या स्थितीत सोडले?'' देवदूत म्हणतात की, ''जेव्हा आम्ही त्यांच्याजवळ गेलो होतो, त्यावेळी पण ते नमाज पढत होते; आणि जेव्हांआम्ही त्यांच्यापासून आलो तेव्हा पण आम्ही त्यांना नमाज पढतांनाच सोडून आलो आहोत.'' (बुखारी व मुस्लीम)
७) काही म्हणतात की, तहज्जुद, ज्याचा अर्थ झोपण्याचा पण आहे, आणि झोपेमधून जागे होण्याचा पण. आणि येथे हाच दुसरा अर्थ आहे, की रात्री झोपून उठावे आणि नफील (नमाजी) पढाव्यात. म्हणजे 'तहज्जुद' चा भावार्थ, रात्रीच्या मागील प्रहरांत उठून नफील नमाज पढणे आहे. संपूर्ण रात्र, नमाज पढणे सुन्नतच्या विरूद्ध आहे. नबी ﷺ, रात्रीच्या पहिल्या भागांत, झोपेत मागच्या भागांत उठून 'तहज्जुद' पढत. हीच सुन्नत आहे.
८) काहींनी याचा अर्थ काढला आहे, हे एक जास्तीचे फर्ज आहे; जे आपण ﷺ साठी खास आहे. अशा प्रकारे ते म्हणतात की, नबी ﷺ वर तहज्जुद पण अशाप्रकारे फर्ज होती, ज्याप्रमाणे पांची नमाजी फर्ज होत्या. तथापि उम्मत करीता तहज्जुद नमाज फर्ज नाही. काही म्हणतात की, नाफिलतन (जास्तीची) चा अर्थ, हा आहे की, आपण ﷺ च्या दर्जे वाढविण्यासाठी, जास्तीची गोष्ट आहे. कारण की आपण गुन्ह्यापासून क्षमा मिळालेले आहेत. जेव्हा की उम्मतीसाठी, हे आणि दुसरी कर्मे, गुन्ह्यासाठी प्रायश्चित्त आहेत. आणि काही म्हणतात की, जास्तीची नफीलच आहे; म्हणजे न आपल्यावर ﷺ फर्ज होती न आपल्या उम्मतवर. ही एक जास्तीची उपासना आहे. जिचे श्रेष्ठत्व खचित्च जास्त आहे. आणि यावेळी अल्लाह आपल्या उपासनेने फारच खुष होतो. तथापि ही नमाज फर्ज, व वाजीब, न नबी ﷺ वर होती, न आपल्या उम्मतवर फर्ज आहे.
९) हे ते ठिकाण आहे, जे कयामतच्या दिवशी अल्लाहतआला नबी ﷺ ला, प्रदान करील; आणि याच ठिकाणावर आपण ﷺ मोठी शफाअत करतील; ज्याच्यानंतर लोकांचा (कर्मांचा) हिशेब होईल.
१०) काही म्हणतात की, ही हिजरतच्या प्रसंगी अवतीर्ण झाली. जेव्हा की आपल्यासमोर मदिनेत प्रवेश करण्याची, आणि मक्केहून निघण्याची समस्या पुढे होती. काही म्हणतात याचा अर्थ आहे, मला सत्त्यावर मरण दे; आणि सत्त्यासहच कयामतच्या दिवशी उठव. काही म्हणतात की, मला कबरीत सत्त्यासह दाखल कर, आणि कयामतच्या दिवशी, जेव्हा कबरीतून उठवशील तर सत्त्यासह कबरीतून काढ, वगैरे. इमाम शौकानी म्हणतात की, कारण की ही दुआ आहे, म्हणून इच्यात सर्व साधारणपणे, या सर्व गोष्टी येऊन जातात.
११) हदीसमध्ये येते की, मक्केच्या विजयानंतर, जेव्हा नबी ﷺ, जेव्हा खान-ए-काबामध्ये दाखल झाले, तेव्हा तेथे तीनशे साठ मूर्त्या होत्या. आपल्या हातांत छडी होती, आपण ﷺ छडीच्या टोकाने, त्या मूर्तींना मारत जात आणि 'जाअल हक्क व जहकल बातील', आणि जाअल् हक्क वमा युबदि ऊल बातिलु व मा युअीद' म्हणत जात.'' (स.बुखारी व स.मुस्लिम)
१२) या भावार्थाचे महावाक्य, सू.यूनुस - ५७ मध्ये येऊन चुकले आहे. त्याचा समास पाहून घेतला जावा.
१३) याच्यात माणसाच्या त्या स्थिती आणि अवस्थेचा उल्लेख आहे, ज्यात तो सर्वसाधारणपणे, सुसंपन्नतेच्या काळी, आणि संकटकाळी, व्यस्त होतो. सुसंपन्नतेच्या काळांत तो अल्लाहला विसरून जातो, आणि संकटकाळी निराश होऊन जातो. परंतु ईमानवाल्यांचा मामला दोन्ही स्थितीत, यापेक्षांवेगळा असतो. (कृपया पहा, सू.हूद. आ,९ ते ११ चे समास)
१४) याच्यात मुशरिकीनकरता धमकावणी आहे; आणि याचा तोच भावार्थ आहे, जो सू.हूदच्या आ.१२१-१२२ चा आहे. ''व कुल लिल्लजीना लायुअमिनुन इअमलु, अला मकानितुकुम इन्ना आमिलून. ''शाकिलतुन.'' चा अर्थ नियत धर्म, पद्धती आणि प्रकृतीचे आहेत. काही म्हणतात की याच्यात काफिरांकरीता निर्भत्सना आणि ईमानवाल्यांसाठी, प्रशंसेची बाजू आहे; कारण की याचा अर्थ आहे की, प्रत्येक माणूस असे कर्म करितो, जे त्याच्या चारित्र्य आणि कर्तृत्वावर आधारीत असते; जी त्याची सवय आणि स्वभाव असतो.

وَيَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الرُّوْحِ ۭ قُلِ الرُّوْحُ مِنْ اَمْرِ رَبِّيْ وَمَآ اُوْتِيْتُمْ مِّنَ الْعِلْمِ اِلَّا قَلِيْلًا ﴿٨٥﴾

आणि हे लोक आपल्याला आत्म्याच्या बाबतीत प्रश्न करतात; आपण उत्तर द्या की, आत्मा माझ्या पालनकर्त्याच्या हुकूमाने आहे. आणि तुम्हांस फारच अल्प ज्ञान दिले गेले आहे[१]. ८५

وَلَىِٕنْ شِئْنَا لَنَذْهَبَنَّ بِالَّذِيْٓ اَوْحَيْنَآ اِلَيْكَ ثُمَّ لَا تَجِدُ لَكَ بِهٖ عَلَيْنَا وَكِيْلًا ﴿٨٦﴾

आणि जर आम्ही इच्छूं, तर जे वह्य आम्ही आपल्याकडे उतारले आहे, सर्व उचलून घेऊं[२]; मग आपणास याच्यासाठी, आमच्या मुकाबल्यांत कोणी मददगार पण मिळू शकणार नाही.[३] ८६

اِلَّا رَحْمَةً مِّنْ رَّبِّكَ ۭ اِنَّ فَضْلَهٗ كَانَ عَلَيْكَ كَبِيْرًا ﴿٨٧﴾

शिवाय आपल्या पालनकर्त्याच्या रहमतचे[४] खचित्च आपणावर ही त्याची मोठीच कृपा आहे. ८७

قُلْ لَّىِٕنِ اجْتَمَعَتِ الْاِنْسُ وَالْجِنُّ عَلٰٓي اَنْ يَّاْتُوْا بِمِثْلِ هٰذَا الْقُرْاٰنِ لَا يَاْتُوْنَ بِمِثْلِهٖ وَلَوْ كَانَ بَعْضُهُمْ لِبَعْضٍ ظَهِيْرًا ﴿٨٨﴾

घोषित करून टाका की, जर तमाम मानव आणि सर्व जिन्न मिळून या कुरआनासारखे, आणू इच्छतील; तर या सर्वांना, याच्यासारखे आणणे अशक्य आहे; जरी ते आपसात, एक दुसऱ्याचे मददगार बनून गेलेत.[५] ८८

وَلَقَدْ صَرَّفْنَا لِلنَّاسِ فِيْ هٰذَا الْقُرْاٰنِ مِنْ كُلِّ مَثَلٍ ۡ فَاَبٰٓى اَكْثَرُ النَّاسِ اِلَّا كُفُوْرًا ﴿٨٩﴾

आणि आम्ही तर या कुरआनांत, लोकांच्या समजण्याकरीता, सर्व प्रकारचे दृष्टांत फिरवून फिरवून सांगून दिले आहेत; परंतु बहुतेक लोक, नाकारण्यावरच अडीग राहिले.[६] ८९

وَقَالُوْا لَنْ نُّؤْمِنَ لَكَ حَتّٰى تَفْجُرَ لَنَا مِنَ الْاَرْضِ يَنْۢبُوْعًا ﴿٩٠﴾

आणि त्यांनी म्हटले[७] की, आम्ही तुमच्यावर कधीच ईमान आणणार नाही; येथपावेतो की, आपण आमच्याकरीता, जमिनीतून झरा वाहवून द्याल ९०

اَوْ تَكُوْنَ لَكَ جَنَّةٌ مِّنْ نَّخِيْلٍ وَّعِنَبٍ فَتُفَجِّرَ الْاَنْهٰرَ خِلٰلَهَا تَفْجِيْرًا ﴿٩١﴾

किंवा स्वत: आपल्यासाठीच कोणी बाग असावा, खजुर आणि द्राक्षांचा; आणि त्याच्या दर्म्यान, आणि पुष्कळसे पाण्याचे पाट वाहवून दाखवाल ९१

१) आत्मा, ती सुक्ष्म वस्तू आहे, जी कोणाला दिसत नाही; परंतु प्रत्येक जीवधाऱ्याचे सामर्थ्य, आणि टवटवीतपणा याच आत्म्यात लपलेला असतो. त्याची वास्तविकता आणि असल काय आहे? हे कोणी जाणत नाही. यहूद्यांनी पण एकदा, नबी ﷺ ला, त्याच्या बाबतीत विचारले, तेव्हा हे महावाक्य उतरले. (स.बुखारी व मुस्लिम ) महावाक्याचा अर्थ हा आहे की, तुमचे ज्ञान, अल्लाहच्या ज्ञानाच्या तुलनेत फारच अल्प आहे; आणि हा आत्मा ज्याच्या बाबत तुम्ही विचारत आहांत, त्याचे ज्ञान तर, अल्लाहने पैगंबरांसमवेत कुणालापण दिले नाही. बस! एवढे समजा की, हा माझ्या... पालनकर्त्याचा हुकूम आहे. किंवा माझ्या पालनकर्त्याच्या सामर्थ्यामधून आहे; ज्याच्या वास्तविकतेला फक्त तोच जाणतो.

२) म्हणजे ‘वह्य’ च्या मार्फत जे थोडे फार ज्ञान दिले गेले आहे, जर अल्लाहतआला इच्छील, तर त्याला पण मिटवून टाकेन. म्हणजे मनांतून काढून टाकीन. किंवा पुस्तकांतून मिटवून टाकीन.

३) जो दुसऱ्यादा त्या ‘वह्य’ ला आपल्याकडे परतवून देईल.

४) की त्याने अवतरीत केलेल्या वह्याला त्याने मिटवून टाकले नाही. किंवा अल्लाहच्या वह्याने आपणांस प्रतिष्ठा दिली.

५) कुरूआन मजीदच्या संबंधात हे आव्हान याच्यापूर्वी, कित्येक जागी येऊन चुकले आहे. हे चॅलेंज आजपर्यंत उत्तराच्या प्रतीक्षेत आहे.

६) हे महावाक्य या अध्यायाच्या सुरवातीला सुद्धा, येऊन चुकले आहे.

७) ईमान आणण्याकरीता मक्केच्या कुरैशींनी, या मागण्या पुढे केल्या.

أَوْ تُسْقِطَ السَّمَآءَ كَمَا زَعَمْتَ عَلَيْنَا كِسَفًا أَوْ تَأْتِيَ بِاللَّهِ وَالْمَلَٰٓئِكَةِ قَبِيلًا ﴿٩٢﴾

**किंवा, आपण आमच्यावर आकाशाचे टुकडे टुकडे करून पाडून टाकावे, जसा की तुमचा विचार आहे; किंवा आपण स्वत: अल्लाहतआलाला आणि देवदूतांना, आमच्यासमोर आणून उभे करावे[१] ९२**

أَوْ يَكُونَ لَكَ بَيْتٌ مِّن زُخْرُفٍ أَوْ تَرْقَىٰ فِي السَّمَآءِ ۖ وَلَن نُّؤْمِنَ لِرُقِيِّكَ حَتَّىٰ تُنَزِّلَ عَلَيْنَا كِتَٰبًا نَّقْرَؤُهُۥ ۗ قُلْ سُبْحَانَ رَبِّي هَلْ كُنتُ إِلَّا بَشَرًا رَّسُولًا ﴿٩٣﴾

**किंवा तुमचे स्वत:साठी कोणी सोन्याचे घर[२] होऊन जावे. किंवा आपण आकाशावर चढून जावे; आणि आम्ही तर आपल्या चढून जाण्याचा पण, त्या वेळपर्यंत विश्वास करणार नाही, जोपर्यंत की, आपण कोणी पुस्तक आमच्यावर उतरवून आणणार नाही; ज्याला आम्ही स्वत: वांचून घेऊ[३]. आपण उत्तर द्या की, माझा पालनकर्ता पवित्र आहे; मी तर फक्त एक मनुष्यच आहे, जो पैगंबर बनवून दिला गेला आहे. [४] ९३**

وَمَا مَنَعَ النَّاسَ أَن يُؤْمِنُوٓا إِذْ جَآءَهُمُ الْهُدَىٰٓ إِلَّآ أَن قَالُوٓا أَبَعَثَ اللَّهُ بَشَرًا رَّسُولًا ﴿٩٤﴾

**आणि लोकांजवळ हिदायत पोहचून चुकल्यानंतर, ईमानापासून मना करणारी फक्त ही गोष्ट राहिली की, त्यांनी म्हटले काय अल्लाहने, एका माणसालाच पैगंबर बनवून पाठविले [५]? ९४**

قُل لَّوْ كَانَ فِي الْأَرْضِ مَلَٰٓئِكَةٌ يَمْشُونَ مُطْمَئِنِّينَ لَنَزَّلْنَا عَلَيْهِم مِّنَ السَّمَآءِ مَلَكًا رَّسُولًا ﴿٩٥﴾

**आपण सांगून द्या की, जर जमिनीवर देवदूत चालते फिरते आणि वस्तीकडून राहत असते, तर आम्ही सुद्धा त्यांच्याजवळ कोण्या आकाशी देवदूतालाच, पैगंबर बनवून पाठवतो[६] ९५**

قُلْ كَفَىٰ بِاللَّهِ شَهِيدًۢا بَيْنِي وَبَيْنَكُمْ ۚ إِنَّهُۥ كَانَ بِعِبَادِهِۦ خَبِيرًۢا بَصِيرًا ﴿٩٦﴾

**आपण सांगून द्या की, माझ्या आणि तुमच्या दर्म्यान, अल्लाहतआलाचे साक्षी होणे पुरेसे आहे[७]; तो आपल्या सेवकांशी खूप वाकब आणि त्यांची कृत्ये खूब पाहणारा आहे; ९६**

१) म्हणजे आमच्या समक्ष येऊन उभे रहावे; आणि आम्ही त्यांना प्रत्यक्ष आमच्या डोळ्यांनी पहावे.

२) 'जुखरूफ' चा मुळ अर्थ शोभेचा आहे. 'मुजखरफून' सुशोभित वस्तुला म्हणतात. परंतु याचा येथे अर्थ सोन्याचा आहे.

३) म्हणजे आमच्यातून प्रत्येक मनुष्य, त्याला स्वत: स्पष्ट स्पष्ट वांचू शकत असेल.

४) अर्थ हा आहे की, माझ्या पालनकर्त्यात तर सर्व प्रकारचे सामर्थ्य आहे. तो जर इच्छील तर तुमच्या मागण्या, एका क्षणांत, शब्द 'कुन्' ने पूर्ण करून टाकीन. परंतु जेथपर्यंत माझा संबंध आहे, मी तर तुमच्याच सारखा एक माणूस आहे. काय कोणी मनुष्य या गोष्टी करण्यास समर्थ आहे? जी यांची माझ्याकडून मागणी करीत आहांत. होय ! याचबरोबर मी अल्लाहचा पैगंबर सुद्धा आहे. परंतु पैगंबराचे काम फक्त अल्लाहचा संदेश पोहचविणे आहे; तर तो मी तुम्हांस पोहचवूंन दिला, आणि पोहचवत आहे. लोकांच्या मागणीवर, चमत्कार जाहीर करून दाखविणे, हा पैगंबरीचा भाग नाही. तथापि जर अल्लाह इच्छील, तर पैगंबरीच्या सत्यतेकरितां, एखाद दुसरा चमत्कार दाखवला जातो. परंतु लोकांच्या इच्छेनुसार जर चमत्कार दाखविणे सुरू करून दिले जाईल; तर हा क्रम तर कुठेही जाऊन थांबू शकणार नाही. प्रत्येक मनुष्य आपल्या इच्छेप्रमाणे, नवा चमत्कार पाहण्याचा आकांक्षित असेल. आणि पैगंबर मग याच कामावर लागून राहील. प्रचार आणि प्रसाराचे मूळ काम ठप्प होऊन जाईल. म्हणजे चमत्कारांचे दाखविणे, फक्त अल्लाहच्या मर्जीनेच शक्य आहे. आणि ही मर्जी, त्या बुद्धी आणि प्रयोजनानुसार होत असते, ज्याचे ज्ञान त्याच्याशिवाय कोणाला नाही. मी सुद्धा त्याच्या मर्जीत ढवळा ढवळ करण्यास अखत्यार दिला गेलेलो नाही.

५) म्हणजे कोण्या माणसाचे पैगंबर होणे, काफिर आणि मुशरिकीनसाठी, फारच आश्चर्याची गोष्ट होती. ते ही गोष्ट मान्य करण्यास तयार नव्हते की, आमच्या सारखा माणूस, जो आमच्या सारखा चालतो फिरतो; आमच्याच सारखा खातो पितो; आमच्याच सारखा नाते संबंधात गुंतलेला आहे, त्याने पैगंबर बनून जावे ! हेच आश्चर्य त्यांच्या ईमान आणण्यांत रूकावट राहिले.

६) अल्लाहतआलाने फर्माविले, जेव्हा जमिनीवर मनुष्य मात्र वसतात, तर त्यांच्या हिदायत करता, पैगंबरपण मनुष्यच असणार; मनुष्येतर पैगंबर, मनुष्यांच्या हिदायतचे कर्तव्य पारू पांडू शकत नाही. हां! जर जमिनीवर देवदूत वसत असते, तर त्यांच्यासाठी पैगंबरपण, खचित्‌च देवदूतच असते.

७) म्हणजे माझ्यावर जी जबाबदारी प्रचार व प्रसारची होती, ती मी पार पाडली. या बाबतीत, माझ्या आणि तुमच्या दर्म्यान, अल्लाहचे साक्षी होणे पुरेसे आहे. कारण की, प्रत्येक गोष्टीचा फैसला, त्यालाच करावयाचा आहे.

وَمَنْ يَّهْدِ اللّٰهُ فَهُوَ الْمُهْتَدِ ۚ وَمَنْ يُّضْلِلْ فَلَنْ تَجِدَ لَهُمْ اَوْلِيَآءَ مِنْ دُوْنِهٖ ؕ وَنَحْشُرُهُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ عَلٰى وُجُوْهِهِمْ عُمْيًا وَّبُكْمًا وَّصُمًّا ؕ مَاْوٰىهُمْ جَهَنَّمُ ؕ كُلَّمَا خَبَتْ زِدْنٰهُمْ سَعِيْرًا ﴿٩٧﴾

النصف

आणि अल्लाह ज्याला सरळ मार्गाला लावून देईन, त्याला तर मार्ग मिळून गेला, आणि ज्याला तो (सरळ) मार्गाहून भटकवून देईल, तर अशक्य आहे, तू त्याचा मददगार त्याच्या शिवाय आणखी कोणाला पावणार नाही[१]. अशा लोकांचा आम्ही कयामतच्या दिवशी, त्यांना उलट तोंडाने उठवू[२]; वास्तविक ते आंधळे, मुके व बहिरे असतील[३]; त्यांचे ठिकाण 'जहन्नम' असेल, जेव्हांकधी ती विझू लागेल; आम्ही त्यांच्यावर तिला आणखी भडकवून देऊं ९७

ذٰلِكَ جَزَآؤُهُمْ بِاَنَّهُمْ كَفَرُوْا بِاٰيٰتِنَا وَقَالُوْٓا ءَاِذَا كُنَّا عِظَامًا وَّرُفَاتًا ءَاِنَّا لَمَبْعُوْثُوْنَ خَلْقًا جَدِيْدًا ﴿٩٨﴾

हे सर्व आमच्या निशाण्याना नाकारणारे आणि या म्हणण्याचा बदला आहे की, काय जेव्हा आम्ही हाडके आणि कण कण होऊन जाऊ, मग आम्ही नव्या निर्मितीत, उठवून उभे केले जाऊ[४]? ९८

اَوَلَمْ يَرَوْا اَنَّ اللّٰهَ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ قَادِرٌ عَلٰٓى اَنْ يَّخْلُقَ مِثْلَهُمْ وَجَعَلَ لَهُمْ اَجَلًا لَّا رَيْبَ فِيْهِ ؕ فَاَبَى الظّٰلِمُوْنَ اِلَّا كُفُوْرًا ﴿٩٩﴾

काय त्यांनी पाहिले नाही की, ज्या अल्लाहने आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले आहे, तो यांच्या सारख्यांच्या निर्मितीवर, पूर्ण समर्थ आहे[५]. त्यानेच त्यांच्या करता, एक अशी वेळ नक्की करून ठेवली आहे, जी शंकाकुशंकेने एकदम रिक्त आहे[६]. परंतु अन्यायी लोक, नाकारतच राहतील. ९९

قُلْ لَّوْ اَنْتُمْ تَمْلِكُوْنَ خَزَآئِنَ رَحْمَةِ رَبِّيْٓ اِذًا لَّاَمْسَكْتُمْ خَشْيَةَ الْاِنْفَاقِ ؕ وَكَانَ الْاِنْسَانُ قَتُوْرًا ﴿١٠٠﴾

ع ١١

आपण सांगून द्या की, जर समजा, तुम्ही माझ्या पालनकर्त्याच्या, दयेच्या खजिन्यांचे मालक झाला असता, तर तुम्ही त्यावेळी सुद्धा, त्याच्या खर्च होऊन जाण्याच्या भीतीने[७],रोखून धरते आणि मनुष्य आहे ही संकुचित् मनाचा १००

وَلَقَدْ اٰتَيْنَا مُوْسٰى تِسْعَ اٰيٰتٍۭ بَيِّنٰتٍ فَسْـَٔلْ بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ اِذْ جَآءَهُمْ فَقَالَ لَهٗ فِرْعَوْنُ اِنِّيْ لَاَظُنُّكَ يٰمُوْسٰى مَسْحُوْرًا ﴿١٠١﴾

आणि आम्ही मूसाला नऊ[८] चमत्कार खुल्लम खुल्ला प्रदान केले, तू स्वत:च बनी इस्राईलला विचारून घे; की जेव्हा ते त्यांच्याजवळ पोहचले, तेव्हा फिरऔन म्हणाला की हे मूसा! माझ्या विचारांत तर तुझ्यावर जादू करून देण्यात आला आहे १०१

قَالَ لَقَدْ عَلِمْتَ مَآ اَنْزَلَ هٰٓؤُلَآءِ اِلَّا رَبُّ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ بَصَآئِرَ ۚ وَاِنِّيْ لَاَظُنُّكَ يٰفِرْعَوْنُ مَثْبُوْرًا ﴿١٠٢﴾

मूसाने उत्तर दिले की, हे तर तू समजूनच चुकला आहेस की, आकाश आणि पृथ्वीच्या पालनकर्त्यानेच हे चमत्कार दाखविण्या समजाविण्याकरीता अवतरीत केले आहेत; हे फिरऔना! मी तर समजत आहे की, तू खचित्च बर्बाद आणि नष्ट केला गेला आहेस १०२

فَاَرَادَ اَنْ يَّسْتَفِزَّهُمْ مِّنَ الْاَرْضِ فَاَغْرَقْنٰهُ وَمَنْ مَّعَهٗ جَمِيْعًا ﴿١٠٣﴾

सरशेवटी फिरऔनाने पक्का इरादा करून घेतला की, त्यांना देशांत सळो की पळो करून सोडावे; तर तेव्हा आम्ही त्याला आणि त्याच्या सर्व साथीदारांना गर्क करून टाकले १०३

وَّقُلْنَا مِنْۢ بَعْدِهٖ لِبَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ اسْكُنُوا الْاَرْضَ فَاِذَا جَآءَ وَعْدُ الْاٰخِرَةِ جِئْنَا بِكُمْ لَفِيْفًا ﴿١٠٤﴾

आणि याच्यानंतर आम्ही बनी इस्राईलला सांगून टाकले की, या देशात[९] तुम्ही रहा, वसा; हां! परंतु जेव्हा परलोकाचा वायदा येऊन पोहचेल, आम्ही तुम्हा सर्वांस गोळा करून आणि लपटून घेऊन येऊ १०४

१) माझ्या आवाहन व प्रचाराने कोण ईमान आणतो, कोण नाही, हे पण अल्लाहच्या अखत्यारीत आहे; माझे काम फक्त प्रचार करणे आहे.

२) हदीसमध्ये येते की, सहाबा कराम ﷺ नी आश्चर्य व्यक्त केले की, उलट्या तोंडाने कसा काय हशर होईल? नबी ﷺ नी फर्माविले, ''ज्या अल्लाहने त्यांना पायाने चालण्याची ताकद दिली आहे. तो या गोष्टीलापण समर्थ आहे की त्यांने चेहऱ्याने चालवून द्यावे.'' (स.बुखारी स.मुस्लीम,)

३) म्हणजे ज्याप्रमाणे ते जगांत, सत्याच्या बाबतीत आंधळे, बहिरे आणि मुके बनून राहिले; कयामतच्या दिवशी

त्याचा बदला म्हणून, आंधळे, बहिरे आणि मुके होतील.

४) म्हणजे नरकाग्नीची ही शिक्षा, त्यांना यासाठी देण्यात येईल की, त्यांनी आमच्या अवतरीत केलेल्या निशाण्यांना, मान्य केले नाही; आणि या ब्रम्हांडात पसरलेल्या, अस्तित्वांत असलेल्या निशाण्यांवर चिंतन आणि मनन केले नाही. ज्यामुळे त्यांनी, कयामतचे घडून येणे, आणि मेल्यानंतर पुन्हा जिवंत होऊन उठणे यांना, फारच अशक्य आहे, असा विचार केला. आणि म्हटले की, हडके आणि कण कण होऊन गेल्यानंतर, आम्हास एक नवीन जन्म कसा मिळूंशकतो ?

५) अल्लाहने याच्या उत्तरांत फर्मावीले, जो अल्लाह आकाश आणि पृथ्वीचा निर्माता आहे, तो यांच्या सारख्यांची निर्मिती, किंवा दुसऱ्यादा पण त्यांना जीवन देण्यावर सुद्धा समर्थ आहे. कारण की हे तर आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीपेक्षाजास्त सोपे आहे. ''आकाश आणि पृथ्वीचे निर्माण करणे, मानवांच्या निर्मितीहून जास्त मोठे आणि कठीण काम आहे.'' (सू.मोमिन – ५७) याच विषयाला अल्लाहतआलाने सू.अहकाफ – ३३ आणि सू.–यासीन – ८१,८२ मध्ये सुद्धा सांगितले आहे.

६) या 'अजल' (म्हणजे निश्चित वेळेने) ने अभिप्रेत मृत्यू किंवा कयामत आहे. येथे विषयाच्या अनुषंगाने, कयामत अभिप्रेत धरणे जास्त बरोबर आहे. म्हणजे आम्ही त्यांना दुसऱ्यादा जिवंत करून, कबरींतून उठवण्याकरीता एक वेळ नक्की करून ठेवला आहे. ''आम्ही त्यांच्या मामल्याला, एका निश्चित वेळेपर्यंत, पुढे ढकलून ठेवले आहे.'' (सू.हुद – १०४)

७) 'खशयत्ल इन्फाक' चा अर्थ आहे, या भीतीने की, खर्च करून संपवून टाकू, याच्यानंतर फकीर होऊन जाऊ. वास्तविक हा अल्लाहचा खजीना आहे, जो (कधीच) संपणारा नाही. कारण की, मनुष्य संकुचित् मनाचा बनविला गेला आहे, म्हणून कंजुषीने काम घेतो. दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्मावीले, ''त्यांना जर अल्लाहच्या बादशाही मधून काही वाटा मिळून जाईल, तर हे लोकांना काहीच देणार नाहीत.'' (सू.निसाअ–५३) 'नकीर' तिळाला म्हणतात; तिळा बरोबर सुद्धांकोणाला देणार नाही. ही तर अल्लाहची मेहरबानी आणि त्याची कृपा आहे, की त्याने आपल्या खजिन्याची तोंडे, लोकांकरीता उघडून ठेवली आहेत. ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे. ''अल्लाहचे हात भरलेले आहेत. तो रात्रंदिवस खर्च करतो; पण त्याच्यांत काहीही कमी होत नाही. जरा पहा तर खरे! जेव्हा पासून त्याने आकाश व पृथ्वी निर्माण केली आहेत, किती प्रमाणांत खर्च केला असेल, परंतु त्याच्या हातात जे काही आहे, त्याच्यांत कमी नाही. (ते भरलेले चे भरलेले आहेत.)'' (बुखारी, मुस्लिम)

८)ते नऊ चमत्कार आहेत, हात, लाठी, दुष्काळ, फळांची कमी, वादळ, टोळधाड, ढेकूण व उवा, बेडूक आणि रक्त. इमाम हसन बसरी म्हणतात की, दुष्काळ आणि फळांची कमी एकच गोष्ट आहे. आणि नववा चमत्कार, लाठीचे जादुगरांच्या हातचलाखीला गिळून जाणे आहे. ह.मूसा عليه السلام ला याच्याशिवाय पण चमत्कार दिले गेले होते. उदाहरणार्थ काठीचे दगडावर मारणे, ज्याच्यातून बारा झरे जाहीर झाले होते. ढगांची सांवली करणे, मन्न व सल्वा, वगैरे. परंतु येथे नऊ चमत्कारांनी, फक्त तेच चमत्कार अभिप्रेत आहेत, ज्यांना प्रत्यक्ष फिरऔन आणि त्याच्या लोकांनी पाहिले. म्हणून ह.इब्ने अब्बास رضي الله عنه नी समुद्राचे फाटून, रस्ता बनून जाणे याला सुद्धां, या नऊ चमत्कारांत गणले आहे. आणि दुष्काळ आणि फळांच्या कमीला एक चमत्कार गणला आहे. तिर्मिझीच्या एका रिवायतीत, नऊ चमत्कारांचा तपशील याहून वेगळा सांगण्यात आला आहे. परंतु सनदीनुसार ही रिवायत जईफ आहे. म्हणून नऊ चमत्कारांने अभिप्रेत,हेच चर्चित चमत्कार आहेत.

९) उघडपणे या भूप्रदेशाने अभिप्रेत इजिप्त आहे, ज्यांतून फिरऔनने आणि ह.मूसा عليه السلام व त्यांच्या लोकांना काढण्याचा इरादा केला होता. परंतु बनी इस्त्राईलच्या इतिहासाचा पुरावा आहे की, ते इजिप्तहून निघाल्यानंतर, दुसऱ्यादा इजिप्तमध्ये गेले नाहीत. किंबहुना चाळीस वर्षे तियाच्या मैदानांत काढल्यानंतर, पॅलेस्टाईनमध्ये दाखल झाले. याचा पुरावा सू.आअराफ वगैरे मध्ये कुरआनाच्या सांगण्यानुसार सुद्धा मिळतो. म्हणून बरोबर हेच आहे की, याच्याने अभिप्रेत पॅलेस्टाईनचा भूप्रदेश आहे.

وَبِالْحَقِّ أَنزَلْنَاهُ وَبِالْحَقِّ نَزَلَ ۗ وَمَا أَرْسَلْنَاكَ إِلَّا مُبَشِّرًا وَنَذِيرًا ﴿١٠٥﴾

आणि आम्ही या कुरआनाला सत्त्यासह उतारले; आणि ते पण सत्त्यासह उतरले.[१] आम्ही आपणास फक्त शुभवर्तमान देणारा आणि भिवविणारा[२] बनवून पाठविले आहे. १०५

وَقُرْآنًا فَرَقْنَاهُ لِتَقْرَأَهُ عَلَى النَّاسِ عَلَىٰ مُكْثٍ وَنَزَّلْنَاهُ تَنزِيلًا ﴿١٠٦﴾

आणि कुरआनाला आम्ही थोडे थोडे करून यासाठी उतारले आहे[३] की, आपण याला सवलतीने लोकांना ऐकवावे; आणि आम्ही स्वत: सुद्धा त्याला, हळूंहळूंअवतरीत केले. १०६

قُلْ آمِنُوا بِهِ أَوْ لَا تُؤْمِنُوا ۚ إِنَّ الَّذِينَ أُوتُوا الْعِلْمَ مِن قَبْلِهِ إِذَا يُتْلَىٰ عَلَيْهِمْ يَخِرُّونَ لِلْأَذْقَانِ سُجَّدًا ﴿١٠٧﴾

(आपण) सांगून टाका, तुम्ही याच्यावर ईमान आणा अथवा आणू नका; ज्यांना याच्यापूर्वी ज्ञान दिले आहे, त्यांच्याजवळ, जेव्हांपण त्याचे वाचन केले जाते, तेव्हा ते हनुवटी वाटे पालथे पडून सिजद्यांत पडून जातात[४] १०७

وَيَقُولُونَ سُبْحَانَ رَبِّنَا إِن كَانَ وَعْدُ رَبِّنَا لَمَفْعُولًا ﴿١٠٨﴾

आणि म्हणतात की आमचा पालनकर्ता पवित्र आहे. आमच्या पालनकर्त्याचा वायदा, कुठल्याही संशयाशिवाय, पूर्ण होऊन राहणार आहे.[५] १०८

وَيَخِرُّونَ لِلْأَذْقَانِ يَبْكُونَ وَيَزِيدُهُمْ خُشُوعًا ۩ ﴿١٠٩﴾ السجدة

ते आपल्या हनुवटीवाटे, रडत रडत सिजद्यांत पडून जातात; आणि हे कुरआन त्यांच्या विनयात आणि व्याकुळतेत, भर घालते[६] १०९

قُلِ ادْعُوا اللَّهَ أَوِ ادْعُوا الرَّحْمَٰنَ ۖ أَيًّا مَّا تَدْعُوا فَلَهُ الْأَسْمَاءُ الْحُسْنَىٰ ۚ وَلَا تَجْهَرْ بِصَلَاتِكَ وَلَا تُخَافِتْ بِهَا وَابْتَغِ بَيْنَ ذَٰلِكَ سَبِيلًا ﴿١١٠﴾

सांगून टाका की, अल्लाहला अल्लाह म्हणून बोलवा, किंवा रहमान म्हणून; ज्या नांवाने पण बोलवाल, सर्व चांगली चांगली नांवे त्याचीच आहेत.[७] न तर तू आपली नमाज मोठ्या स्वरांत पढ. न बिल्कुल हळू; किंबहुना त्यांतील मध्यम वर्ग स्वीकार[८] ११०

وَقُلِ الْحَمْدُ لِلَّهِ الَّذِي لَمْ يَتَّخِذْ وَلَدًا وَلَمْ يَكُن لَّهُ شَرِيكٌ فِي الْمُلْكِ وَلَمْ يَكُن لَّهُ وَلِيٌّ مِّنَ الذُّلِّ ۖ وَكَبِّرْهُ تَكْبِيرًا ﴿١١١﴾ ع ١٢

आणि हे म्हणत रहा, सर्व स्तुती अल्लाहकरताच आहे, ज्याला न कोणी संतती आहे, आणि न कोणी, त्याची बादशाहीत सरकतदार आहे. आणि तर ठर्वल्यतामुळे कोणी त्याचा मित्र आहे. आणि तू त्याची पुरेपुर महती (आणि गौरव) करीत रहा. १११

آيَاتُهَا ١١٠ (١٨) سُورَةُ الْكَهْفِ مَكِّيَّةٌ (٦٩) رُكُوعَاتُهَا ١٢

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

## (१८) सू.कहफ मक्की

महावाक्ये ११० | रुकूअ १२

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

الْحَمْدُ لِلَّهِ الَّذِي أَنزَلَ عَلَىٰ عَبْدِهِ الْكِتَابَ وَلَمْ يَجْعَل لَّهُ عِوَجًا ۜ ﴿١﴾

सर्व स्तुती त्याच अल्लाहसाठी योग्य आहे, ज्याने आपल्या सेवकावर हे कुरआन अवतरीत केले; आणि याच्यांत कुठलीही कसर, बाकी ठेवली नाही.[९]. १

قَيِّمًا لِّيُنذِرَ بَأْسًا شَدِيدًا مِّن لَّدُنْهُ وَيُبَشِّرَ الْمُؤْمِنِينَ الَّذِينَ يَعْمَلُونَ الصَّالِحَاتِ أَنَّ لَهُمْ أَجْرًا حَسَنًا ﴿٢﴾

किंबहुना सर्व ठिक ठाक ठेवले की, आपल्या जवळच्या[१०] कडक शिक्षेने, सावध करून द्यावे. आणि ईमान आणणाऱ्यांना, आणि चांगली कामे करणाऱ्यांना, खुषखबरी ऐकून द्याव्यांत की त्यांच्यासाठी उत्कृष्ट बदले आहेत २

१) म्हणजे संरक्षित (सुरक्षित) आपल्या जवळ पोहचून गेले; त्याच्यांत रस्त्यांत काही कमी जास्ती, आणि आणखी काही बदल, आणि भेसळ करण्यात आली नाही. यासाठी की त्याला आणणारा देवदूत, शदीदुल कुवा, अल्अमीन, अल्मकीन, आणि अल् मुताआ फील् मलाईल् आला. ही ती वैशिष्टये आहेत, जी ह.जिब्रईल عليه السلام.च्या बाबतीत कुरआनांत सांगण्यात आली आहे.

२) मुबश्शीर म्हणजे खुशखबरी देणारा, आज्ञापालन करणाऱ्यांसाठी आणि नजीर म्हणजे भिवविणारा

आज्ञाभंजकांसाठी.
३) 'फरकनाहू' चा एक दुसरा अर्थ, आम्ही त्याला स्पष्ट करून किंवा खुलाशासह सांगून दिले आहे पण केला गेला आहे.
४) म्हणजे ते धर्मपंडीत, ज्यांनी कुरआनाच्या अवतरणापूर्वी, पूर्वीची पुस्तके वांचली आहेत; आणि ते वह्य च्या वास्तविकतेला आणि पैगंबरीच्या लक्षणांशी परिचित आहेत; ते सिजद्यांत पडून जातात. या गोष्टीवर अल्लाहचे आभार मानतात की, त्यांनी शेवटच्या पैगंबरांना ओळखण्याची सुबुद्धी दिली; आणि कुरआन आणि पैगंबरीवर ईमान आणण्याचे सद्भाग्य नशिबी दिले.
५) अर्थ हा आहे की, हे मक्केचे काफिर, जे प्रत्येक गोष्टीकडून अपरिचीत आहेत, जर हे ईमान आणत नाहीत, तर आपण पर्वा करू नये. यासाठी की जे ज्ञान बाळगतात; आणि वह्य आणि पैगंबरीच्या वास्तविकतेशी परिचीत आहेत, हे याच्यावर ईमान जेऊन आले आहेत; किंबहुना कुरआन ऐकून, अल्लाहच्या समोर सिजद्यांत पडून जातात. आणि त्याची पवित्रता वर्णीतात, आणि आपल्या पालनकर्त्याच्या वायद्यावर विश्वास ठेवतात.
६) हनुवटीवाटे सिजद्यांत पडून जाण्याचा, दोनदा उल्लेख केला. पहिला सिजदा अल्लाहच्या आदर सन्मानार्थ आणि आभार म्हणून होता, आणि कुरआन ऐकून जे भय त्यांच्यावर लागू झाले, आणि त्याच्या परिणामाने आणि आदर सन्मानाने ते प्रभावित झाले, त्यामुळे ते दुसऱ्यांदा सिजद्यांत पडून गेलेत.
७) ज्याप्रमाणे पहिले येऊन चुकले आहे की, मक्केच्या मुशरिकीनसाठी, अल्लाहचे विशेष नांव 'रहमान' किंवा 'रहीम' हे अपरिचीत होते. आणि काही सहाबांच्या म्हणण्यात (आसार) येते की, काही मुशरिकीनने नबी ﷺ च्या मुखाने या रहमान व रहीमचे शब्द ऐकले; तेव्हा म्हटले की, आम्हास हा सांगतो की, फक्त एका अल्लाहला बोलवा,आणि स्वत: दोन दोन उपास्यांना बोलवित आहे. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (इब्ने कसीर)
८) याच्या अवतरण्याच्या कारणांत, ह.इब्ने अब्बास ﷺ सांगतात की, मक्केत रसूल्लुल्लाह ﷺ, लपून राहत असत. जेव्हा आपल्या साथीदारांना नमाज पढवत, तेव्हा उंच स्वरांत पढवीत. मुशरिकीन कुरआन ऐकून, कुरआनाला आणि अल्लाहला, वाईट साईट बोलू लागले. अल्लाहतआलाने फर्माविले, आपल्या आवाजाला इतके उंच करू नका, की मुशरिकीनने ऐकून कुरआनाला बरे वाईट म्हणावे; आणि आवाज इतका हळूपण करू नका की, सहाबा ﷺ पण ऐकू नये. (बुखारी, व मुस्लिम) स्वत: नबी ﷺ ची गोष्ट आहे. की एका रात्री नबी ﷺ. चे जाणे, ह.अबुबकर सिद्दीक च्या बाजुने झाले. तर त्यांनी पाहिले की ते खालच्या आवाजांत नमाज पढत आहे. मग ह.उमर ﷺ.ला पण बघण्याचा योग आला, तर ते उच्च आवाजांत नमाज पढत होते. आप ﷺ नी दोघांना विचारले, तेव्हा ह.अबुबकर सिद्दीक ﷺ नी सांगितले, ज्याच्यासमोर मी मुनाजात मध्ये व्यस्त होतो, तो माझा आवाज ऐकत होता. ह.उमर ﷺ नी उत्तर दिले की, माझा उद्देश्य झोपणाऱ्यांना जागवणे, आणि शैतानाला पळविणे होता. आपण ﷺ नी सिद्दीके अकबर ﷺ ला फर्माविले, आपला आवाज थोडा उंच करा; आणि ह.उमर ﷺ ला फर्माविले, आपला आवाज काहीसा खाली आणा. (अबुदाऊद, तिर्मिझी) ह.आयेशा ﷺ म्हणते की, हे महावाक्य दुआच्या बाबतीत अवतीर्ण झाले आहे. (स.बुखारी, स. मुस्लिम)
✪ कहफचा अर्थ गुहेचा आहे. यात असहाबे कहफची गोष्ट सांगण्यात आली आहे. म्हणून याला सू.कहफ म्हटले जाते. याची सुरवातीची दहा महावाक्ये आणि शेवटची दहा महावाक्ये यांचे महत्त्व हदीशींमध्ये सांगण्यात आले आहे. की जो यांना पाठ करेल, आणि म्हणेल, तो दज्जालच्या फितन्यापासून सुरक्षित राहील. (स.मुस्लिम, फजल सू.कहफ) आणि जो याचे पठण शुक्रवारच्या दिवशी करेल, तर येत्या शुक्रवारपर्यंत त्याच्याकरीतांएका खास नूरचा प्रकाश राहील. (मुसतरदक हाकीम ३६८) याच्या वाचनाने घरांत शांती आणि बरकत अवतरीत होते. एकदा एका सहाबीने सू.कहफ वांचला. घरांत एक जनावर पण होते, ते उधळू लागले; त्यांनी लक्ष देऊन पाहिले की, काय गोष्ट आहे? तेव्हा त्यांना एक ढग दृष्टीस पडला, ज्याने त्यांना ढापून घेतले होते. सहाबी ﷺ ने या घटनेचे वर्णन जेव्हा नबी ﷺ जवळ केले, तेव्हा आपण सल्ल. नी फर्माविले, ''वाचत जा! कुरआन पढत असतांना, शांती (सकीनत) अवतरीत होत असते.'' (स.बुखारी,स.मुस्लीम)
१) किंवा यात कोणी वक्रता नाही आणि यालामध्यम मार्गी ठेवला किंबहुना याला 'कय्यीम' म्हणजे सरळ ठेवले. किंवा 'कय्यीम' चा अर्थ, सेवकांच्या धार्मिक आणि ऐहिक समस्यांचे विचार करणे आणि संरक्षण करणारे पुस्तक.
१०) 'मिंल्लदून्ह्' जे अल्लाहकडून सादर किंवा अवतरीत होणार आहे.

مَّا كِثِيْنَ فِيْهِ اَبَدًا ۙ﴿٣﴾

ज्यात ते सदा सर्वदा राहतील. ③

وَّيُنْذِرَ الَّذِيْنَ قَالُوا اتَّخَذَ اللّٰهُ وَلَدًا ۤ﴿٤﴾

आणि त्या लोकांना पण भय दाखीव, जे म्हणतात की, अल्लाहतआला संतती बाळगतो[१] ④

مَا لَهُمْ بِهٖ مِنْ عِلْمٍ وَّلَا لِاٰبَآئِهِمْ ؕ كَبُرَتْ كَلِمَةً تَخْرُجُ مِنْ اَفْوَاهِهِمْ ؕ اِنْ يَّقُوْلُوْنَ اِلَّا كَذِبًا ﴿٥﴾

वास्तवांत न तर त्यांना स्वत:ला काही त्याचे ज्ञान आहे. न त्यांच्या वाडवडीलांना; हे कुभांड फारच वाईट आहे, जे यांच्या तोंडून निघते आहे. जे निव्वळ खोटे बकत आहेत[२] ⑤

فَلَعَلَّكَ بَاخِعٌ نَّفْسَكَ عَلٰٓى اٰثَارِهِمْ اِنْ لَّمْ يُؤْمِنُوْا بِهٰذَا الْحَدِيْثِ اَسَفًا ﴿٦﴾

मग जर हे लोक, या गोष्टीवर[३] ईमान आणणार नाहीत, तर काय आपण यांच्या मागे, आपल्या जीवाचा घात करून घेणार ⑥

اِنَّا جَعَلْنَا مَا عَلَى الْاَرْضِ زِيْنَةً لَّهَا لِنَبْلُوَهُمْ اَيُّهُمْ اَحْسَنُ عَمَلًا ﴿٧﴾

जमिनीच्या पृष्ठभागावर जे काही आहे[४], आम्ही त्याला जमिनीच्या शोभेला कारणीभूत केले आहे; की आम्ही त्यांची परीक्षा घ्यावी की, यांच्यातून कोण चांगली कामे करणार आहे ⑦

وَاِنَّا لَجٰعِلُوْنَ مَا عَلَيْهَا صَعِيْدًا جُرُزًا ؕ﴿٨﴾

यावर जे काही आहे, आम्ही त्याला एक सपाट मैदान करून टाकणार आहोत[५] ⑧

اَمْ حَسِبْتَ اَنَّ اَصْحٰبَ الْكَهْفِ وَالرَّقِيْمِ ۙ كَانُوْا مِنْ اٰيٰتِنَا عَجَبًا ﴿٩﴾

काय तू आपल्या विचारांत गुहा आणि शिलालेखवाल्यांना, आमच्या निशाण्यांमधून, कोणी विचित्र निशाणी समजत आहेस?[६] ⑨

اِذْ اَوَى الْفِتْيَةُ اِلَى الْكَهْفِ فَقَالُوْا رَبَّنَآ اٰتِنَا مِنْ لَّدُنْكَ رَحْمَةً وَّهَيِّئْ لَنَا مِنْ اَمْرِنَا رَشَدًا ﴿١٠﴾

आणि या काही तरूणांनी, जेव्हा गुहेत आश्रय घेतला, तेव्हा दुआ केली की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास आपल्याकडून रहमत प्रदान कर; आणि आमच्या कामांत, आमच्या करता, सन्मार्ग (पत्करण्याला) ला सोपे करून टाक[७] ⑩

१) जसे यहूदी, ख्रिस्ती आणि काही मुशरिकीन (देवदूत अल्लाहच्या मुली आहेत) वगैरेंची श्रद्धा आहे.
२) या कलम्याने (कुंभाड) अभिप्रेत हेच आहे की, अल्लाहची संतती आहे; जे निव्वळ खोटे आहे.
३) 'बिहाजल हदीस' (या गोष्टी) ने अभिप्रेत, कुरआन करीम आहे. काफिरांनी ईमान आणण्याची जितकी तीव्र इच्छा, आपण सल्ल. बाळगत होते. आणि त्यांच्या आक्षेप घेण्याने आणि त्यापासून पळ काढण्याने, आपणास फारच तीव्र दु:ख होत होते. याच्यात आपल्या ﷺ याच अवस्था आणि स्थितीचे वर्णन आहे.
४) पृथ्वीच्या पृष्ठभागांवर जे काही आहे, प्राणी, खनीजे, वनस्पती, दगडे आणि दुसरे गाडलेले खजीने ही सर्व या जगाची शोभा आणि त्याची चमक धमक आहे.
५) 'सईदन्' सपाट (आणि स्वच्छ) मैदान, 'जुरूज' एकदम सपाट, ज्याच्यांत कोणी वृक्ष वगैरे नसावा. म्हणजे एक वेळ येईल की, जग आपल्या संपूर्ण चमक धमक समवेत, नष्ट होऊन जाईल; आणि जमिनीच्या पृष्ठभागावर एक, कुठलाही सावली देणारा वृक्ष राहणार नाही आणि जमीन सपाट मैदानासारखी होऊन जाईल. याच्यानंतर आम्ही पुण्यवान आणि पाप्यांना त्यांच्या कर्मांप्रमाणे प्रतिफळ देऊ.
६) म्हणजे ही एकटी मोठी आणि विचित्र निशाणी नाही. परंतु आमची प्रत्येक निशाणी विचित्रच आहे. ही आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, आणि त्यांचे व्यवस्थापन, सूर्य,चंद्र आणि चमकदार तारे आणि त्यांना आज्ञांकित करणे, रात्र आणि दिवसाचे येणे जाणे आणि इतर असंख्य निशाण्या, काय कमी आश्चर्यजनक आहेत. कहफ त्या गुहेला म्हणतात, जी पर्वतांत असते. 'रकीम' काहींजवळ त्या वस्तीचे नांव आहे, जेथून हे तरूण गेले होते. काही म्हणतात त्या पर्वताचे नांव आहे ज्याच्यांत ती गुहा होती. काही म्हणतात, 'रकीम' म्हणजे लिखीत आहे आणि एक पाटी आहे लोखंडाची किंवा शिश्याची; जिच्यांत असहाबे कहफची नांवे लिहली आहेत. त्याला 'रकीम' या साठी म्हणण्यात आले आहे की, त्यावर नांवे लिहिलेली आहेत. नबीन शोध घेतल्याने ठाऊक झाले की, पहिली गोष्ट जास्त बरोबर आहे. ज्या डोंगरात ही गुहा आहे, त्याच्याजवळच एक वस्ती आहे, जिला आतां 'अर्रकीब' म्हटले जाते, जे कालप्रवाहामुळे, 'अर्रकीम' चे बिघडलेले स्वरूप आहे.
७) हे तेच नवतरूण आहेत, ज्यांना अस्हाबे कहफ म्हणण्यात आले. (तपशील पुढे येत आहे.) त्यांनी जेव्हा आपल्या धर्माला वाचवत, गुहेत आश्रय घेतला, तेव्हा ही दुआ मागितली. असहाबे कहफच्या या गोष्टीत, तरूणांसाठी मोठा धडा आहे. आजकालच्या तरूणांचा, जास्त तर वेळ, निरर्थक गोष्टीत बर्बाद होतो. आणि अल्लाहकडे काही ध्यान नाही.हाय! आजचे मुसलमान तरूण, आपले तारूण्य अल्लाहच्या उपासनेत खर्च करोत.

فَضَرَبۡنَا عَلٰۤی اٰذَانِهِمۡ فِی الۡكَهۡفِ سِنِیۡنَ عَدَدًا ﴿۱۱﴾

**मग आम्ही त्यांच्या कानांवर, मोजलेल्या काही वर्षापर्यंत, याच गुहेत परदे टाकून दिले[१] ११**

ثُمَّ بَعَثۡنٰهُمۡ لِنَعۡلَمَ اَیُّ الۡحِزۡبَیۡنِ اَحۡصٰی لِمَا لَبِثُوۡۤا اَمَدًا ﴿۱۲﴾

**मग आम्ही त्यांना उठवून उभे केले की, आम्ही हे माहित करून द्यावे की, या दोन्ही समूहातून, या थांबून रहाण्याच्या मुदतीला, जी त्यांनी घालविली, कोण जास्त[२] आठवण ठेवतो १२**

نَحۡنُ نَقُصُّ عَلَیۡكَ نَبَاَهُمۡ بِالۡحَقِّ ؕ اِنَّهُمۡ فِتۡیَةٌ اٰمَنُوۡا بِرَبِّهِمۡ وَ زِدۡنٰهُمۡ هُدًی ﴿۱۳﴾

**आम्ही त्यांची खरी गोष्ट, तुमच्यासमोर सांगत आहोत. हे काही तरूण[३], ज्यांनी आपल्या पालनकर्त्यावर ईमान आणले होते. आणि आम्ही त्यांच्या हिदायतीत वाढ (करून) दिली होती. १३**

وَّ رَبَطۡنَا عَلٰی قُلُوۡبِهِمۡ اِذۡ قَامُوۡا فَقَالُوۡا رَبُّنَا رَبُّ السَّمٰوٰتِ وَ الۡاَرۡضِ لَنۡ نَّدۡعُوَا۠ مِنۡ دُوۡنِهٖۤ اِلٰـهًا لَّقَدۡ قُلۡنَاۤ اِذًا شَطَطًا ﴿۱۴﴾

**आम्ही त्यांची अंत:करणे मजबुत करून दिली होती[४]. जेव्हा की ते उठून उभे राहिले[५]; आणि म्हणू लागले की, आमचा परवरदिगार तर तोच आहे, जो आकाश आणि पृथ्वीचा पालनकर्ता आहे. हे अशक्य आहे की, आम्ही त्याच्याशिवाय अन्य उपास्याला बोलवावे; जर आम्ही असे केले तर फारच चुकीची[६] गोषट सांगितली १४**

१) म्हणजे कानावर परदे टाकून, त्यांच्या कानांना बंद करून टाकले; की बाहेरच्या आवाजाने त्यांच्या झोपेत व्यत्यय येऊ नये. अर्थ हा आहे की, आम्ही गाढ निद्रेत झोपवून टाकले.

२) या दोन समूहाने अभिप्रेत, मतभेद करणारे लोक आहेत. हे एक तर त्याच काळातील लोक होते, ज्यांच्या दर्म्यान, यांच्या बाबतीत, मतभेद झाला. किंवा पैगंबराच्या काळांतील ईमानवाले आणि काफिर आहेत. काही म्हणतात की, हे असहाबे कहफच आहेत, त्यांचे दोन गट होऊन गेले होते. एक म्हणत होता की आम्ही इतका काळ झोपून होतो; दुसरा त्याचे खंडन करी; आणि पहिल्या गटाला, कमी किंवा जास्त मुदत सांगावयाचा.

३) आतांथोडक्यात तपशील सांगण्यांत येत आहे. हे तरूण, काही म्हणतात की, खीस्ती होते आणि काही म्हणतात की,यांचा काळ ह.ईसा عليه السلام च्या पूर्वीचा आहे. हाफिज इब्ने कसीरने या म्हणण्याला प्राधान्य दिले आहे. असे म्हणतात की, एक बादशाह होता, 'दकयानुस'. जो लोकांना मूर्तीची उपासना करण्याला, आणि त्यांच्या नांवाने नवस करण्याला प्रोत्साहन देत असे. अल्लाहतआलाने काही तरूणांच्या मनांत, ही गोष्ट टाकून दिली की, उपासनेच्या लायक तर फक्त एक अल्लाहच आहे, जो आकाश आणि पृथ्वीचा निर्माता, ब्रम्हांडाचा पालनकर्ता आहे; 'फित्यतून' ज्याने ठाऊक होते की, त्यांची संख्या ९ किंवा त्याहून ही कमी होती. हे वेगळे होऊन, कोण्या एके ठिकाणी, एक अल्लाहची उपासना करीत असत. हळू हळू लोकांमध्ये त्यांच्या एकेश्वरवादाच्या श्रद्धेची चर्चा झाली, तर बादशाहपर्यंत गोष्ट पोहोचली, आणि त्याने, त्यांना आपल्या दरबारात बोलावून विचारले. तेव्हा त्यांनी तेथे बेधडक अल्लाहच्या तौहीदला (एकेश्वरवाद) सांगितले. सरशेवटी मग बादशाह आणि आपल्या मुशरिक् समाजाच्या भीतीने, आपल्या धर्माला वाचविण्यासाठी, वस्तीपासून दूर, एका डोंगराच्या गुहेत आश्रय घेतला. जेथे अल्लाहतआलाने त्यांना निद्रेच्या आधिन करून दिले; आणि ते तेथे तिनशे नऊ (३०९) वर्षे झोपून राहिले.

४) म्हणजे हिजरत केल्यामुळे, आपल्या नातेवाईका पासून वेगळे होणे, आणि सुखासिन जीवनापासून वंचित् होणे, यांचेमुळे त्यांना जे दु:ख झाले; आम्ही त्यांच्या मनाला मजबूत करून दिले; कारण की त्यांनी या कठीण गोष्टींना सहन करून घ्यावे. तसेच सत्य बोलण्याचे कर्तव्य पण हिंमतीने आणि धाडसाने पार पाडू शकावे.

५) या उभे रहाण्याने अभिप्रेत, बहुतेक भाष्यकारांजवळ, ते बोलावणे आहे, जे बादशाहच्या दरबाराकडून त्यांना आले; आणि बादशाहच्या समोर उभे राहून त्यांनी तौहीद (एकेश्वरवादा) चे प्रवचन दिले. काही म्हणतात की, शहराच्या बाहेर आपसातच, उभे राहून एक दुसऱ्याला तौहीदची ती गोष्ट सांगितली, जी व्यक्तीश: अल्लाहकडून त्यांच्या मनांत टाकली गेली. आणि अशाप्रकारे तौहीदवाले, आपसांत एक होऊन गेले.

६) 'शतता' चा अर्थ, खोट्याचा किंवा मर्यादेच्या बाहेर निघून जाण्याचा आहे.

هٰٓؤُلَآءِ قَوْمُنَا اتَّخَذُوْا مِنْ دُوْنِهٖٓ اٰلِهَةً ۭ لَوْلَا يَاْتُوْنَ عَلَيْهِمْ بِسُلْطٰنٍۢ بَيِّنٍ ۭ فَمَنْ اَظْلَمُ مِمَّنِ افْتَرٰى عَلَى اللّٰهِ كَذِبًا ۝١٥

हा आहे आमचा समाज! याने याच्याशिवाय, अन्य आणखी उपास्य बनवून ठेवले आहेत. यांच्या (उपास्य) होण्याचे हे कोणी स्पष्ट प्रमाण का सादर करीत नाही? अल्लाहतआला वर खोटा आळ, घेणाऱ्यांपेक्षा जास्त जालीम आणखी कोणंअसूंशकतो ⑮

وَاِذِ اعْتَزَلْتُمُوْهُمْ وَمَا يَعْبُدُوْنَ اِلَّا اللّٰهَ فَاْوٗٓا اِلَى الْكَهْفِ يَنْشُرْ لَكُمْ رَبُّكُمْ مِّنْ رَّحْمَتِهٖ وَيُهَيِّئْ لَكُمْ مِّنْ اَمْرِكُمْ مِّرْفَقًا ۝١٦

आणि जेव्हा की, तुम्ही त्यांच्याकडून, आणि अल्लाहच्याशिवाय, त्यांच्या आणखी उपास्याकडून, अलिप्त होऊन गेलेत, तर मग आता तुम्ही कोण्या गुहेमध्ये[१] जाऊन बसा. तुमचा पालनकर्ता तुमच्यावर आपल्या दयेची सांवली करून देईल. आणि तुमच्याकरीता तुमच्या कामात सवलत मिळवून देईन ⑯

وَتَرَى الشَّمْسَ اِذَا طَلَعَتْ تَّزٰوَرُ عَنْ كَهْفِهِمْ ذَاتَ الْيَمِيْنِ وَاِذَا غَرَبَتْ تَّقْرِضُهُمْ ذَاتَ الشِّمَالِ وَهُمْ فِيْ فَجْوَةٍ مِّنْهُ ۭ ذٰلِكَ مِنْ اٰيٰتِ اللّٰهِ ۭ مَنْ يَّهْدِ اللّٰهُ فَهُوَ الْمُهْتَدِ ۚ وَمَنْ يُّضْلِلْ فَلَنْ تَجِدَ لَهٗ وَلِيًّا مُّرْشِدًا ۝١٧

आणि तुम्ही पाहाल की, सूर्य, उदय होण्याच्या वेळी, यांच्या गुहेच्या उजव्या बाजूला झुकून जातो, आणि अस्ताच्या वेळेला, त्यांच्या डावीकडून निघून जातो. आणि ते या गुहेच्या विस्तृत जागेत आहेत[२]. हे अल्लाहच्या निशाण्या मधून आहे.[३] अल्लाहतआला ज्याचे मार्गदर्शन करेल, तो सरळ मार्गावर आहे; आणि ज्याला तो मार्गभ्रष्ट करून टाकेल. अशक्य आहे की, आपण त्याचा कोणी कार्यसाधक आणि मार्गदर्शक पाऊं शकाल[४] ⑰

وَتَحْسَبُهُمْ اَيْقَاظًا وَّهُمْ رُقُوْدٌ ڰ وَّنُقَلِّبُهُمْ ذَاتَ الْيَمِيْنِ وَذَاتَ الشِّمَالِ ڰ وَكَلْبُهُمْ بَاسِطٌ ذِرَاعَيْهِ بِالْوَصِيْدِ ۭ لَوِ اطَّلَعْتَ عَلَيْهِمْ لَوَلَّيْتَ مِنْهُمْ فِرَارًا وَّلَمُلِئْتَ مِنْهُمْ رُعْبًا ۝١٨

आणि आपण असा विचार कराल की, ते जागे आहेत; वास्तविक ते झोपलेले आहेत[५]. स्वत: आम्हीच त्यांना उजवीकडे डावीकडे कुशी बदलत असतो[६]. त्यांचा कुत्रापण चौकटीवर, आपले पुढील पाय पसरून (बसलेला) आहे. जर तुम्ही त्यांना झांकून पांहू इच्छाल, तर अवश्य उलट पावली; पळून जाल. आणि त्यांच्या भीती आणि रूबाबाने, तुमच्या मनांत दहशत भरून जाईल[७] ⑱

१) म्हणजे जेव्हा तुम्ही आपल्या समाजाच्या उपास्याकडून, अलिप्तता स्वीकारली आहे, तर आता शारीरिक दृष्टीने सुद्धा, यांच्या पासून वेगळे होऊन जा. हे असहाबे कहफ ने आपसांत म्हटले. म्हणून याच्यानंतर ते एका गुहेत जाऊन लपले. जेव्हा त्यांच्या गायब होण्याची बातमी प्रसिद्ध झाली, तेव्हा त्यांचा शोध घेण्यात आला. पण ते अशाप्रकारे अयशस्वी झाले, ज्या प्रमाणे, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या शोधांत मक्केचे काफिर गारेसूरपर्यंत पोहचून गेल्यानंतर सुद्धां, जिच्यात आपण ﷺ आणि ह.अबूबकर सिद्दीक रज़ि. बरोबर होते, अयशस्वी राहिले होते.

२) म्हणजे सूर्योदयाच्या वेळी, उजवीकडे, आणि अस्त होते वेळी डाव्या बाजूला वळून (सूर्य) निघून जात असे; आणि अशाप्रकारे त्यांच्यावर दोन्ही वेळेस उन पडत नसे. वास्तविक ते गुहेमध्ये विस्तृत जागेत, आराम करण्यासाठी पहुडलेले होते. फजवतीन चा अर्थ ऐसपेस जागा.

३) म्हणजे सूर्याचे अशा प्रकारे निघून जाणे, की ऐसपैस जागा असूनसुद्धा, तेथे ऊन न पडावे, हे अल्लाहच्या निशाण्यामधून आहे.

४) जसे दकीयानुस बादशाह आणि त्याचे अनुयायी हिदायत पासून वंचित् राहिले, त्यांना कोणीही सरळ मार्गावर आणूंशकला नाही.

५) 'अयकाज' यकिजुन' चे अनेक वचन आणि 'रुकुद' राकिद' चे अनेकवचन आहे. ते जागे यासाठी वाटत होते, की त्यांचे डोळे उघडे होते, ज्याप्रमाणे जागणाऱ्या माणसाचे असतात. काही म्हणतात की, जास्त कुशी बदलण्यामुळे, जे जागलेले वाटत होते.

६) कारण की त्यांच्या शरीराला मातीने खाऊन टाकू नये.

७) ही त्यांच्या संरक्षणाकरीता, अल्लाहतआलाकडून व्यवस्था होती; की कोणी त्यांच्या जवळ जाऊ न शकावे.

وَكَذٰلِكَ بَعَثۡنٰهُمۡ لِيَتَسَآءَلُوۡا بَيۡنَهُمۡ ؕ قَالَ قَآئِلٌ
مِّنۡهُمۡ كَمۡ لَبِثۡتُمۡ ؕ قَالُوۡا لَبِثۡنَا يَوۡمًا اَوۡ بَعۡضَ يَوۡمٍ ؕ
قَالُوۡا رَبُّكُمۡ اَعۡلَمُ بِمَا لَبِثۡتُمۡ ؕ فَابۡعَثُوۡۤا اَحَدَكُمۡ
بِوَرِقِكُمۡ هٰذِهٖۤ اِلَى الۡمَدِيۡنَةِ فَلۡيَنۡظُرۡ اَيُّهَاۤ اَزۡكٰى
طَعَامًا فَلۡيَاۡتِكُمۡ بِرِزۡقٍ مِّنۡهُ وَلۡيَتَلَطَّفۡ وَلَا
يُشۡعِرَنَّ بِكُمۡ اَحَدًا ﴿١٩﴾

आणि अशा प्रकारे आम्ही त्यांना जागवून, उठवून दिले(१); की, आपसात विचारपूस करून घ्यावे. एका म्हणणाऱ्याने म्हटले की बरे बांधवांनो! तुम्ही येथे किती वेळ थांबून राहिलात? त्यांनी उत्तर दिले की, एक दिवस, किंवा एक दिवसाहून पण कमी(२). ते म्हणू लागले की, तुमच्या थांबून रहाण्याचे ज्ञान, उत्तम प्रकारे अल्लाहतआलालाच आहे(३). आतांतर तुम्ही आपल्यातून कोणाला आपले हे चांदी (चे शिक्के) देऊन, शहरांत पाठवा; त्याने चांगले पाहून सवरून घ्यावे की, शहरांतील कोणते जेवण (चोखे आणि) शुद्ध आहे(४). मग त्याच्यातून तुमच्या खाण्यासाठी घेऊन यावे; आणि त्याने फार काळजी घ्यावी; आणि नम्रता धारण करावी; आणि कोणाला तुमची बातमी लागू देऊ नये(५). (१९)

اِنَّهُمۡ اِنۡ يَّظۡهَرُوۡا عَلَيۡكُمۡ يَرۡجُمُوۡكُمۡ اَوۡ يُعِيۡدُوۡكُمۡ
فِىۡ مِلَّتِهِمۡ وَلَنۡ تُفۡلِحُوۡۤا اِذًا اَبَدًا ﴿٢٠﴾

जर हे काफिर तुमच्यावर वर्चस्व पावतील, तर तुम्हाला धोंडमार करून टाकतील, किंवा तुम्हास पुन्हाआपल्या धर्मात परतवून घेतील; मग तर तुम्हांस साफल्य मिळणार नाही(६). (२०)

وَكَذٰلِكَ اَعۡثَرۡنَا عَلَيۡهِمۡ لِيَعۡلَمُوۡۤا اَنَّ وَعۡدَ اللّٰهِ حَقٌّ
وَّاَنَّ السَّاعَةَ لَا رَيۡبَ فِيۡهَا ۚ اِذۡ يَتَنَازَعُوۡنَ بَيۡنَهُمۡ
اَمۡرَهُمۡ فَقَالُوا ابۡنُوۡا عَلَيۡهِمۡ بُنۡيَانًا ؕ رَبُّهُمۡ اَعۡلَمُ بِهِمۡ ؕ
قَالَ الَّذِيۡنَ غَلَبُوۡا عَلٰٓى اَمۡرِهِمۡ لَنَتَّخِذَنَّ عَلَيۡهِمۡ
مَّسۡجِدًا ﴿٢١﴾

आम्ही अशाप्रकारे लोकांना यांच्या अवस्थेत माहित करून दिले(७). की, त्यांनी जाणून घ्यावे की, अल्लाहचा वायदा एकदम खरा आहे. आणि कयामत (येण्यात) काहीच शंका नाही(८); जेव्हा की, लोक त्यांच्या संबंधी आपसात मतभेद करीत होते(९); त्यांच्या गुहेवर एक इमारत बनवून घ्या(१०); त्यांचा पालनकर्ताच त्यांच्या स्थितीशी खूप वाकबगार आहे(११). जे लोक त्यांच्या बाबतीत प्रबळ होते, ते म्हणू लागले की, आम्ही तर त्यांच्या जवळपास एक मशीद बनवून घेऊ(१२) (२१)

سَيَقُوۡلُوۡنَ ثَلٰثَةٌ رَّابِعُهُمۡ كَلۡبُهُمۡ ۚ وَيَقُوۡلُوۡنَ
خَمۡسَةٌ سَادِسُهُمۡ كَلۡبُهُمۡ رَجۡمًا ۢ بِالۡغَيۡبِ ۚ وَيَقُوۡلُوۡنَ
سَبۡعَةٌ وَّثَامِنُهُمۡ كَلۡبُهُمۡ ؕ قُلۡ رَّبِّىۡۤ اَعۡلَمُ بِعِدَّتِهِمۡ
مَّا يَعۡلَمُهُمۡ اِلَّا قَلِيۡلٌ ۙ فَلَا تُمَارِ فِيۡهِمۡ اِلَّا مِرَآءً
ظَاهِرًا ۖ وَّلَا تَسۡتَفۡتِ فِيۡهِمۡ مِّنۡهُمۡ اَحَدًا ﴿٢٢﴾

काही लोक तर म्हणतील, की असहाबे कहफ, तीन होते, आणि चवथा त्यांचा कुत्रा होता(१३). काही म्हणतील की पाच होते, आणि सहावा त्यांचा कुत्रा होता. हे सर्व अंधारांत दगड मारणे आहे(१४). काही म्हणतील ते सात आहेत, आणि आठवा त्यांचा कुत्रा आहे(१५). आपण सांगून द्या की, माझा पालनकर्ता त्यांच्या संख्येला, फार चांगल्या प्रकारे जाणणारा आहे; त्यांना फारच थोडे लोक जाणतात(१६). बस! आपण यांच्या संदर्भात, फक्त सरासरी बातचित् करावी(१७). आणि याच्यातून कोणाशी, त्यांच्या बाबतीत विचारपूस पण करू नये(१८) (२२)

وَلَا تَقُوۡلَنَّ لِشَاىۡءٍ اِنِّىۡ فَاعِلٌ ذٰلِكَ غَدًا ۙ﴿٢٣﴾

आणि कधीही कोण्या गोष्टीवर असे म्हणू नका की, मी याला उद्या करेन (२३)

१) म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही त्यांना आपल्या सामर्थ्याने झोपवून दिले होते; अशाचप्रमाणे तीनशे नऊ वर्षांनंतर, आम्ही त्यांना उठवून दिले. आणि या अवस्थेत उठविले की त्याची शरीरे अशाच प्रकारे ठाकठीक होती, ज्याप्रमाणे तीनशे वर्षापूर्वी, झोपते वेळी होती. म्हणूनच त्यांनी आपसांत एक दुसऱ्याना प्रश्न केलेत.

२) जणू, ज्यावेळी ते गुहेत दाखल झाले, सकाळचा पहिला प्रहर होता. आणि जेव्हा जागे झाले तेव्हा, दिवसाचा प्रहर होता. अशा प्रकारे ते समजले की, कदाचित् आम्ही एक दिवस, किंवा त्यापेक्षा सुद्धा कमी, दिवसाचा काही भाग झोपून राहिलो.

३) तथापि भरपुर झोपेमुळे, ते फारच घोटाळ्यांत पडले. आणि शेवटी मामला अल्लाहच्या हवाली करून दिला की, तोच बरोबर मुद्दत जाणतो.

४) जागे झाल्यानंतर, खाद्य जे माणसाची महत्त्वाची आवश्यकता आहे; त्याचा बंदोबस्त करण्याची काळजी लागून राहिली.

५) काळजी आणि नम्र व्यवहाराची ताकीद, या अंदेशाला, नजरेसमोर ठेवून केली, ज्याच्या कारणाने ते शहरांतून निघून, एका निर्जन जागी आले होते; त्याला ताकीद केली की कोठे तुझ्या वागणुकीने शहरवाल्यांना आमचे ज्ञान न होऊन जावो! आणि कोणी नवी आपत्ती आमच्यावर न येऊन पडावी, जसे की पुढच्या महावाक्यात आहे.

६) म्हणजे परलोकाच्या ज्या साफल्यासाठी, आम्ही हा त्रास आणि कष्ट सहन केले; उघड गोष्ट आहे की,

शहरवाल्यांनी आम्हास भाग पाडून, पुन्हा वाडवडीलांच्या धर्माकडे पलटवून नेले, तर आमचा मूळ उद्देश्य समाप्त होऊन जाईन. आमचे कष्ट पण फुकट जातील. आणि आम्ही न तर धर्माचे राहू; न दुनियाचे.

७) म्हणजे ज्या प्रमाणे आम्ही त्यांना झोपविले आणि जागवून दिले; त्याचप्रमाणे लोकांना आम्ही त्यांच्या अवस्थेने सूचित करून दिले. हे सूचित करणे अशा प्रकारे झाले की, जेव्हा असहाबे कहफ चा एक साथीदार, चांदीचे ते नाणे घेऊन शहरांत गेला, ते तीनशे वर्षापूर्वीच्या बादशाह दकियानूसच्या काळातील होते. आणि ते नाणे त्यानेच एका दुकानदाराला दिले, तर तो आश्चर्यचकीत झाला. जेव्हांकी, असहाबे कहफचा साथीदार हे सांगत राहिला की, मी याच शहराचा राहणारा आहे, आणि कालच येथून गेलेलो आहे; परंतु या 'काल' ला तीन शतके होऊन चुकली होती. लोक कशाप्रकारे या गोष्टीला मान्य करते? लोकांना शंका आली की, कोठे या माणसाला, गाडलेला खजीना तर मिळाला नसेल. हळू हळू ही गोष्ट बादशाह किंवा सत्ताधाऱ्यांपर्यंत पोहचली. आणि या साथीच्या मदतीने तो गुहेपर्यंत पोहचला, आणि असहाबे कहफ ची भेट घेतली. याच्यानंतर अल्लाहतआलाने त्यांना मृत्यू दिला. (इब्ने कसीर)

८) म्हणजे असहाबे कहफच्या या घटनेने माहित झाले की, कयामतचे घडणे आणि मृत्युनंतर पुन्हा जिवंत होऊन उठण्याचा अल्लाहचा वायदा खरा आहे. नाकारणाऱ्यांकरीतां, या घटनेत, अल्लाहच्या सामर्थ्याचा एक नमुना आढळून येतो.

९) म्हणजे आम्ही त्यांना, त्यावेळी. त्यांच्या स्थितीशी अवगत केले, जेव्हा ते, मृत्युनंतर पुन्हा जिवंत होऊन उठण्यांत, किंवा कयामतच्या येण्याच्या बाबतीत, आपसांत वादविवाद करीत होते. म्हणजे ती वेळ आठवण करा, जेव्हा ते आपसांत वादविवाद करीत होते.

१०) हे म्हणणारे कोण होते, काही म्हणतात की, त्यावेळेचे ईमानवाले होते. काही म्हणतात की, बादशाह आणि त्याचे साथीदार होते, जेव्हा जाऊन त्यांनी त्यांची भेट घेतली, आणि त्याच्यानंतर अल्लाहने त्यांना पुन्हा झोपवून (मृत्यू दिला) दिले. तेव्हा बादशाह आणि त्याच्या साथीदारांनी म्हटले की त्यांच्या संरक्षणासाठी एक इमारत बनवून देण्यात यावी.

११) झगडा करणाऱ्याना अल्लाहतआलाने फर्माविले, की त्यांच्या बाबतीत खरे ज्ञान फक्त अल्लाहलाच आहे.

१२) हे प्रबळ झालेले ईमानवाले होते, किंवा कुफ्र व शिर्कवाले होते? शौकानी ने पहिल्या मताला प्राधान्य दिले आहे; आणि इब्ने कसीरने दुसऱ्या मताला. कारण की, नेक लोकांच्या कबरीवर मशीदी बांधणे, अल्लाहला पसंत नाही. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''अल्लाहतआला यहूदी आणि ख्रिस्त्यांना शापित करो! ज्यांनी आपले पैगंबर आणि पुण्यवान लोकांच्या कबरींना मशीद बनवून घेतले.'' (स.बुखारी व स.मुस्लिम) ह.उमर رضي الله عنه च्या खिलाफतच्या काळात, इराकमध्ये ह.दानियाल عليه السلام च्या कबरीचा शोध लागला; तेव्हा आपण हुकूम दिला की, तिला लपवून, सर्व साधारण कबरीसारखे करून टाकण्यांत यावे. कारण की, लोकांना समजू नये, की अमकी कबर अमक्या पैगंबराची आहे. (तफसीर इब्ने कसीर)

१३) हे सांगणारे आणि त्यांची निरनिराळी संख्या दाखविणारे, पैगंबरीच्या काळांतील, ईमानवाले आणि काफिर होते. विशेषत: ग्रंथधारी लोक, जे आकाशी ग्रंथाचे परिचीत आणि ज्ञान असल्याचा दावा करीत होते.

१४) म्हणजे ज्ञान, यांच्यातून कोणापाशी नाही; ज्याप्रमाणे पाहिल्याशिवाय कोणी दगड मारवा. हे पण अशाचप्रकारे अंदाजपंचे गोष्टी करीत आहे.

१५) अल्लाहतआलाने फक्त तीन कथन सांगितलेत, पहिल्या दोन कथनांना 'रजमम' बिल गैब (अंदाज आणि गुमान) सांगून, त्यांच्याकडे दुर्लक्ष केले, आणि तिसऱ्या कथनाचा उल्लेख त्याच्यानंतर केला, त्यामुळे काही भाष्यकारांनी हा पुरावा घेतला आहे. की, हा अंदाज या कथनाच्या बरोबर होण्याचे पुरावा आहे; आणि वास्तवांत त्यांची तीच संख्या होती. (इब्ने कसीर)

१६) काही सहाबा رضي الله عنه रिवायत करतात, की ते म्हणत असत मी पण त्या कमी लोकामधून आहे, की जे हे जाणतात की असहाबे कहफ ची संख्या किती होती? ते फक्त सात होते. जसे की तिसऱ्या कथनात सांगण्यात आले आहे. (इब्ने कसीर)

१७) म्हणजे त्याच गोष्टीवर आपण समाधान मानावे, ज्यांची आपणांस वह्यच्या मार्फत सूचना करून देण्यांत आली आहे. किंवा संख्येच्या बाबतीत, वादविवाद व झगडा करू नये; फक्त एवढे म्हणावे की, याबाबतीत कोणी पुरावा नाही.

१८) म्हणजे वादविवाद करणाऱ्याशी, त्यांच्या बाबतीत काही विचारू नये. यासाठी की, ज्याला विचारले जाईल, त्याला विचारणाऱ्यापेक्षा जास्त ज्ञान असावयास पाहिजे; जेव्हांकी येथे मामला उलट आहे. आपल्याजवळ ﷺ तरी सुद्धा खात्रीशीर ज्ञानाचे एक साधन-'वह्य' हे उपस्थित आहे, जेव्हांकी दुसऱ्यांजवळ गुमान आणि अंदाजाशिवाय काही नाही.

إِلَّآ أَن يَشَآءَ ٱللَّهُۚ وَٱذۡكُر رَّبَّكَ إِذَا نَسِيتَ وَقُلۡ عَسَىٰٓ أَن يَهۡدِيَنِ رَبِّي لِأَقۡرَبَ مِنۡ هَٰذَا رَشَدٗا ﴿٢٤﴾

**परंतु त्याच बरोबर, इन्शा अल्लाह म्हणून घ्यावे[१]. आणि जेव्हापण विसराल, आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करून घेत जावे[२]. आणि म्हणत रहावे की, मला पूर्ण खात्री आहे की माझा पालनकर्ता मला, याच्यापेक्षा सुद्धा, हिदायतच्या जवळच्या गोष्टीचे मार्गदर्शन करेल[३] (२४)**

وَلَبِثُواْ فِي كَهۡفِهِمۡ ثَلَٰثَ مِاْئَةٖ سِنِينَ وَٱزۡدَادُواْ تِسۡعٗا ﴿٢٥﴾

**आणि ते लोक आपल्या गुहेत तीनशे वर्षे पर्यंत राहिले. आणि नऊ वर्षे आणखी जास्त घालविली[४] (२५)**

قُلِ ٱللَّهُ أَعۡلَمُ بِمَا لَبِثُواْۖ لَهُۥ غَيۡبُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلۡأَرۡضِۖ أَبۡصِرۡ بِهِۦ وَأَسۡمِعۡۚ مَا لَهُم مِّن دُونِهِۦ مِن وَلِيّٖ وَلَا يُشۡرِكُ فِي حُكۡمِهِۦٓ أَحَدٗا ﴿٢٦﴾

**आपण सांगून द्या, अल्लाहलाच यांच्या थांबण्या रहाण्याच्या मुदतीचे चांगल्या प्रकारे ज्ञान आहे. आकाश आणि पृथ्वींचे अदृष्ट, फक्त त्यालाच ठाऊक आहे, तो किती चांगला पाहणारा आणि ऐकणारा आहे[५]. अल्लाहशिवाय त्यांचा कोणी मददगार नाही; अल्लाहतआला आपल्या हुकुमांत, कोणाला शामील करीत नाही. (२६)**

وَٱتۡلُ مَآ أُوحِيَ إِلَيۡكَ مِن كِتَابِ رَبِّكَۖ لَا مُبَدِّلَ لِكَلِمَٰتِهِۦ وَلَن تَجِدَ مِن دُونِهِۦ مُلۡتَحَدٗا ﴿٢٧﴾

**आणि तुझ्याकडे जे तुझ्या पालनकर्त्याचे पुस्तक वह्य केले गेले आहे, त्याला वांचत रहा[६]. त्याच्या गोष्टींना कोणी बदलणारा नाही; आणि तू त्याच्याशिवाय कधीच कोणी आश्रयाची जागा पावणार नाही[७] (२७)**

१) भाष्यकार म्हणतात की, यहूद्यांनी नबी ﷺ ला तीन गोष्टी विचारल्या होत्या. आत्म्याची वास्तविकता काय आहे. आणि अस्हाबे कहफ आणि जुलकर्नेन कोण होते? असे म्हणतात की हेच प्रश्न, या अध्यायाच्या अवतरणाला कारणीभूत ठरले. नबी ﷺ नी फर्माविले, मी तुम्हांस उद्या उत्तर देईन. परंतु याच्यानंतर १५ दिवसापर्यंत जिब्रईल अ.वह्य घेऊन आले नाहीत. मग जेव्हा आले, तेव्हांअल्लाहतआलाने इन्शा अल्लाह म्हणण्याचा हुकूम दिला. महावाक्यात उद्यांने अभिप्रेत भविष्यकाळ आहे; म्हणजे जेव्हांपण, नजीकच्या भविष्यकाळात किंवा दूरच्या भविष्य काळात, कोणी काम करण्याचा इरादा कराल, तर इन्शा अल्लाह जरूर म्हणत चला. कारण की माणसाला हे ठाऊक नसते की, तो ज्या कामाचा इरादा जाहीर करीत आहे. ते करण्याची सुबुद्धी पण त्याला अल्लाहच्या मर्जीनुसार मिळणार आहे किंवा नाही?

२) म्हणजे जर बोलतांना किंवा वायदा करतांना, 'इन्शा अल्लाह' म्हणणे विसरून जाल, तर जेव्हा पण आठवण येऊन जाईल, इन्शा अल्लाह म्हणून घ्या; किंवा पालनकर्त्याचे स्मरण करण्याचा अर्थ, त्याचे पावित्र्य वर्णन करणे, त्याची स्तुती करणे, आणि त्याच्या जवळ क्षमा मागणे आहे.

३) म्हणजे मी ज्याचा इरादा जाहीर करीत आहे, शक्य आहे अल्लाहतआला त्याच्यापेक्षा जास्त चांगले आणि फायदेकारक कामाकडे माझे मार्गदर्शन करून देईन.

४) बहुतेक भाष्यकारांनी याला अल्लाहचे कथन ठरविले आहे. सौरकाल गणनेनुसार ३०० आणि चांद्रिय कालगणनेनुसार ३०९ वर्षे होतात. ज्ञानवंतांची कल्पना आहे की, हे त्याच लोकांचे कथन आहे, जे यांची वेगवेगळी संख्या सांगत होते, ज्याचा पुरावा अल्लाहचे हे म्हणणे आहे, ''अल्लाहलाच यांच्या राहण्या सवरण्याच्या मुदतीचे चांगल्याप्रकारे ज्ञान आहे.'' ज्याचा अर्थ ते चर्चित मुदतीला मान्य करीत नाहीत. परंतु बहुतेकांच्या भाष्याप्रमाणे याचा भावार्थ हा आहे की, ग्रंथधारी लोक किंवा आणखी कोणी, या दाखविलेल्या मुदतीसाठी मुदतीशी मतभेद करतील, तर आपण त्यांना सांगा, की तुम्ही जास्त जाणता का अल्लाह? जेव्हा त्याने ३०९ वर्षे मुदत सांगितली आहे, तर हीच बरोबर आहे; कारण तोच जाणतो की ते किती काळ गुहेत राहिले?

५) हे अल्लाहच्या ज्ञान आणि माहितीच्या वैशिष्ट्याचे आणखी जास्त स्पष्टीकरण आहे.

६) तसा तर हा हुकूम सर्वसाधारण आहे की, ज्या गोष्टीचे पण वह्य आपल्याकडे केले जाईल, त्याला वाचत जा; आणि लोकांना याचे शिक्षण देत जा. परंतु अस्हाबे कहफच्या गोष्टीच्या संपूर्ण झाल्यावर, या गोष्टीने अभिप्रेत, हे पण असूंशकते की, असहाबे कहफच्या बाबतीत, लोकांनी जे हवे, ते बोलत फिरावे; परंतु अल्लाहतआलाने या बाबतीत, आपल्या पुस्तकांत जे काही, आणि जेवढे काही, सांगून टाकले आहे, तेच बरोबर आहे. तेच लोकांना वांचून दाखवून द्या. याच्याशिवाय दुसऱ्या गोष्टींकडे लक्ष देऊं नये.

७) म्हणजे जर त्याला सांगण्याला टाळाटाळ आणि फेरबदल केला, किंवा त्याच्या शब्दांत फेरबदल करण्याचा प्रयत्न केला, तर अल्लाहपासून आपणास वाचविणारा कोणी असणार नाही. संबोधन जरी नबी ﷺ ला आहे, तरी खरी संबोधित उम्मत आहे.

وَاصْبِرْ نَفْسَكَ مَعَ الَّذِيْنَ يَدْعُوْنَ رَبَّهُمْ بِالْغَدٰوةِ وَالْعَشِيِّ يُرِيْدُوْنَ وَجْهَهٗ وَلَا تَعْدُ عَيْنٰكَ عَنْهُمْ ۚ تُرِيْدُ زِيْنَةَ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۚ وَلَا تُطِعْ مَنْ اَغْفَلْنَا قَلْبَهٗ عَنْ ذِكْرِنَا وَاتَّبَعَ هَوٰىهُ وَكَانَ اَمْرُهٗ فُرُطًا ﴿٢٨﴾

**आणि आपल्या स्वत:ला त्यांच्याच बरोबर ठेवत चल, जे आपल्या पालनकर्त्याचा सकाळ संध्याकाळ धांवा करतात. (आणि त्याची मर्जी संपादू इच्छितात) खबरदार! तुझी दृष्टी त्यांच्यावरून न हटली पाहिजे[१], की, ऐहिक जीवनाच्या थाटामाटाची आकांक्षा बाळगू[२] लागावीस. पहा ! त्याचे म्हणणे मानू नकोस, ज्याच्या अंत:करणाला आम्ही आपल्या स्मरणाकडून गाफील करून टाकले आहे; आणि जो आपल्या मनेच्छेच्या मागे लागून राहिला आहे, आणि ज्याचे काम मर्यादेपलिकडे जाऊन चुकले[३] आहे ⑵⑻**

وَقُلِ الْحَقُّ مِنْ رَّبِّكُمْ ۗ فَمَنْ شَآءَ فَلْيُؤْمِنْ وَّمَنْ شَآءَ فَلْيَكْفُرْ ۙ اِنَّآ اَعْتَدْنَا لِلظّٰلِمِيْنَ نَارًا ۙ اَحَاطَ بِهِمْ سُرَادِقُهَا ۗ وَاِنْ يَّسْتَغِيْثُوْا يُغَاثُوْا بِمَآءٍ كَالْمُهْلِ يَشْوِي الْوُجُوْهَ ۗ بِئْسَ الشَّرَابُ ۗ وَسَآءَتْ مُرْتَفَقًا ﴿٢٩﴾

**आणि घोषित करून टाक, हे निव्वळ सत्य कुरआन, तुमच्या पालनकर्त्याकडून आहे. आता ज्याला पाहिजे त्याने ईमान आणावे, आणि जो इच्छेल त्याने कुफ्र करावे. जालिमा करीता आम्ही ती आग तयार करून ठेवीली आहे, जिच्या ज्वाला त्यांना घेरून घेतील. आणि जर ते पाणी मागतील, तर त्यांची तहान, त्या पाण्याने भागविली जाईल, जे वितळलेल्या तांब्यासारखे असेल, जे चेहरे भाजून टाकेल; फारच वाईट पाणी आहे; आणि फारच वाईट आरामाची जागा (नरकाग्नी) आहे. ⑵⑼**

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ اِنَّا لَا نُضِيْعُ اَجْرَ مَنْ اَحْسَنَ عَمَلًا ۚ ﴿٣٠﴾

**खचित्च ज्या लोकांनी ईमान आणले, आणि चांगली कामे केलीत, तर आम्ही कोण्या चांगले काम करणाऱ्याचे, प्रतिफळ वाया घालवित नसतो[४]. ⑶⑽**

اُولٰٓئِكَ لَهُمْ جَنّٰتُ عَدْنٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهِمُ الْاَنْهٰرُ يُحَلَّوْنَ فِيْهَا مِنْ اَسَاوِرَ مِنْ ذَهَبٍ وَّيَلْبَسُوْنَ ثِيَابًا خُضْرًا مِّنْ سُنْدُسٍ وَّاِسْتَبْرَقٍ مُّتَّكِـِٕيْنَ فِيْهَا عَلَى الْاَرَآئِكِ ۗ نِعْمَ الثَّوَابُ ۗ وَحَسُنَتْ مُرْتَفَقًا ﴿٣١﴾

**त्यांच्यासाठी, नेहमीच्या राहण्याच्या बागा आहेत; ज्यांच्या खालून पाट वहात असतील, तेथे त्यांना सोन्याची कंकणे घातली जातील[५]; आणि हिरव्या रंगाचे,मुलायम आणि बारीक, व जाड रेशमाचे पोषाख परिधान करतील[६]. तेथे सिंहासनावर तक्के लावून बसलेले असतील; किती उत्कृष्ट बदला आहे; आणि कशा प्रकारे चांगल्या आरामाची जागा आहे. ⑶⑴**

१) हा तोच हुकूम आहे, जो याच्यापूर्वी सू.अन्आम-५२ मध्ये येऊन चुकला आहे. अभिप्रेत याच्याने ते सहाबा कराम (रजी.) आहेत, जे गरीब आणि कमजोर होते; ज्यांच्याजवळ बसणे, प्रतिष्ठीत कुरैशांना सहन होत नव्हते. ह.साद बिन अबी वक्कास ﷺ म्हणतात की, आम्ही सहा माणसे, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमबरोबर होतो. माझ्याशिवाय, बिलाल, इब्ने मसऊद, एक हुजली आणि दोन सहाबा ﷺ आणखी होते. मक्केच्या कुरैशांनी इच्छा व्यक्त केली की, या लोकांना आपल्यापासून हटवून टाका, म्हणजे आम्ही आपल्या सेवेत हजर होऊन, आपल्या गोष्टी ऐकू. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या मनांत आले की, चला कदाचित् माझी गोष्ट ऐकण्याने, त्यांची मने बदलून जातील. परंतु अल्लाहतआलाने कडकरीत्या असे करण्यापासून मना केले. (स.मुस्लिम)

२) म्हणजे यांना दूर करून, आपण प्रतिष्ठीत आणि श्रीमंत लोकांना, आपल्याजवळ करू इच्छितात?

३) 'फुरूतन' जर 'अफरात' पासून असेल, तर अर्थ होईल, मर्यादेच्या बाहेर जाणे आणि जर 'तफरीत' पासून असेल, तर अर्थ होईल, यांचे काम कोताईवर आधारीत असेल, तर त्याचा परिणाम,बर्बादी आहे.

४) कुरआनाच्या वर्णनाच्या अंदाजाप्रमाणे, नर्कवासियांच्या उल्लेखानंतर, स्वर्गवाल्यांची चर्चा आहे. कारण की लोकांच्या मनांत, स्वर्गप्राप्ती ची आवड निर्माण होईल.

५) कुरआन अवतरणाच्या काळांत, आणि याच्यापूर्वी रिवाज होता की, राजे, श्रीमंत, आणि टोळ्यांचे सरदार, आपल्या हातात सोन्याचे कडे घालत असत. ज्यामुळे त्यांचे आगळे वेगळे वैशिष्ट्ये, ठळकपणे दिसत असे. स्वर्गवाल्यांना पण, स्वर्गांत ही कडी घातली जातील.

६) 'सुन्दुस' बारीक रेशीम, आणि 'इस्तबरक' जाड रेशीम, या जगांत पुरूषांसाठी, सोने आणि रेशमी पोषाख मना आहेत. जे लोक या हुकूमावर अंमल करीत, जगात या हराम गोष्टीपासून आपला बचाव करतील, त्यांना स्वर्गांत या सर्व गोष्टी प्राप्त होतील. तेथे कुठल्याही गोष्टीची मनाई असणार नाही; किंबहुना स्वर्गवाले, ज्या गोष्टीची इच्छा व्यक्त करतील, ती उपस्थित होईल. ''ज्या गोष्टीला तुमचे मन इच्छेल आणि जे काही तुम्ही मागाल सर्वकाही स्वर्गात हजर आहेत. (सू. हा मीम सजदा-३१)''

وَاضْرِبْ لَهُمْ مَّثَلًا رَّجُلَيْنِ جَعَلْنَا لِاَحَدِهِمَا جَنَّتَيْنِ مِنْ اَعْنَابٍ وَّحَفَفْنٰهُمَا بِنَخْلٍ وَّجَعَلْنَا بَيْنَهُمَا زَرْعًا ۝٣٢

आणि त्यांना त्या दोन माणसांचे उदाहरण पण ऐकवून[१] द्या. ज्यांच्यातून एकाला आम्ही, द्राक्षाच्या दोन बागा देऊन ठेवल्या होत्या. ज्यांना खजुरीच्या वृक्षांनी आम्ही घेरून ठेवले होते[२]. आणि दोहोंच्या दर्म्यान शेती निर्माण करून दिली होती[३]. ३२

كِلْتَا الْجَنَّتَيْنِ اٰتَتْ اُكُلَهَا وَلَمْ تَظْلِمْ مِّنْهُ شَيْئًا ۙ وَّفَجَّرْنَا خِلٰلَهُمَا نَهَرًا ۝٣٣

दोन्ही बागा आपली फळे खूप देत असत याच्यात कुठलीच कमतरता नव्हती[४] आम्ही या बागांच्या दर्म्यान, पाण्याचा पाट वाहवून ठेवला होता[५] ३३

وَّكَانَ لَهٗ ثَمَرٌ ۚ فَقَالَ لِصَاحِبِهٖ وَهُوَ يُحَاوِرُهٗٓ اَنَا اَكْثَرُ مِنْكَ مَالًا وَّاَعَزُّ نَفَرًا ۝٣٤

आणि त्याच्या जवळ (भरपूर) फळे होती. एके दिवशी त्याने गोष्टी गोष्टींतच आपल्या साथीदाराला[६] सांगितले की, मी तुझ्यापेक्षा जास्त श्रीमंत आहे; आणि जथ्थ्याच्या दृष्टीने[७] पण जास्त प्रतिष्ठीत आहे. ३४

وَدَخَلَ جَنَّتَهٗ وَهُوَ ظَالِمٌ لِّنَفْسِهٖ ۚ قَالَ مَآ اَظُنُّ اَنْ تَبِيْدَ هٰذِهٖٓ اَبَدًا ۙ ۝٣٥

आणि तो आपल्या बागेत गेला, आणि होताही आपल्या जीवावर जुलूम करणारा; म्हणू लागला की, मी हा विचार (सुद्धा) करू शकत नाही की, कधी काळी पण हा (बाग) बर्बाद होऊन जाईल ३५

وَّمَآ اَظُنُّ السَّاعَةَ قَآئِمَةً ۙ وَّلَئِنْ رُّدِدْتُّ اِلٰى رَبِّيْ لَاَجِدَنَّ خَيْرًا مِّنْهَا مُنْقَلَبًا ۝٣٦

आणि मला नाही वाटत की, कयामत कायम होऊन जाईन. आणि जर (कदाचित्) मी आपल्या पालनकर्त्याकडे परतविला पण गेलो; तर खचित्च (या परतण्याच्या जागेवर) या पेक्षा सुद्धा जास्त उत्तम[८] पावेल ३६

قَالَ لَهٗ صَاحِبُهٗ وَهُوَ يُحَاوِرُهٗٓ اَكَفَرْتَ بِالَّذِيْ خَلَقَكَ مِنْ تُرَابٍ ثُمَّ مِنْ نُّطْفَةٍ ثُمَّ سَوّٰىكَ رَجُلًا ۝٣٧

त्याच्या साथीदाराने त्याच्याशी बोलतांना म्हटले की, काय तू या (उपास्याशी) कुफ्र करतो, ज्याने तुला मातीतून निर्माण केले; मग वीर्य बिंदूतून, मग तुला पूर्ण माणूस बनवून दिले[९]. ३७

لٰكِنَّا۠ هُوَ اللّٰهُ رَبِّيْ وَلَآ اُشْرِكُ بِرَبِّيْٓ اَحَدًا ۝٣٨

परंतु मी तर श्रद्धा बाळगतो की, तोच अल्लाह माझा पालनकर्ता आहे. मी आपल्या पालनकर्त्याबरोबर कोणाला शरीक करणार नाही[१०]. ३८

وَلَوْلَآ اِذْ دَخَلْتَ جَنَّتَكَ قُلْتَ مَا شَآءَ اللّٰهُ ۙ لَا قُوَّةَ اِلَّا بِاللّٰهِ ۚ اِنْ تَرَنِ اَنَا اَقَلَّ مِنْكَ مَالًا وَّوَلَدًا ۚ ۝٣٩

आणि तुला सामर्थ्य नाही कि (आणि) तू त्याला जेऊन येईल. तू आपल्या बागेत जातांना, असे का म्हटले नाही की जे अल्लाह इच्छील ते होणार आहे. कोणी शक्ती नाही, पण अल्लाहच्या मदतीने[११]; जरी तू मला संपत्ती आणि संततीमध्ये, आपल्यापेक्षा, कमी पाहत आहे. ३९

فَعَسٰى رَبِّيْٓ اَنْ يُّؤْتِيَنِ خَيْرًا مِّنْ جَنَّتِكَ وَيُرْسِلَ عَلَيْهَا حُسْبَانًا مِّنَ السَّمَآءِ فَتُصْبِحَ صَعِيْدًا زَلَقًا ۙ ۝٤٠

परंतु फारच शक्य आहे की, माझा पालनकर्ता मला, तुझ्या या बागेपेक्षांपण उत्तम देईन[१२]. आणि याच्यावर आकाशांतून शिक्षांपाठवून देईन. तर ही खणखणीत सपाट मैदान होऊन जाईन[१३] ४०

اَوْ يُصْبِحَ مَآؤُهَا غَوْرًا فَلَنْ تَسْتَطِيْعَ لَهٗ طَلَبًا ۝٤١

किंवा तिचे पाणी आटून जाईल; (आणि तुला ते काढातांही येणार नाही)[१४] ४१

وَاُحِيْطَ بِثَمَرِهٖ فَاَصْبَحَ يُقَلِّبُ كَفَّيْهِ عَلٰى مَآ اَنْفَقَ فِيْهَا وَهِيَ خَاوِيَةٌ عَلٰى عُرُوْشِهَا وَيَقُوْلُ يٰلَيْتَنِيْ لَمْ اُشْرِكْ بِرَبِّيْٓ اَحَدًا ۝٤٢

आणि तिची (सर्व) फळे शिक्षेने घेरून घेण्यांत आली[१५]; मग तो आपल्या त्या खर्चावर, हात चोळू लागला[१६], जो त्याने तिच्यावर केला होता[१६]. आणि ती बाग तिच्या छतावर कोसळून पडली होती[१७]. आणि (तो मनुष्य) असे म्हणत होता की, अरेरे! मी आपल्या पालनकर्त्याबरोबर कोणालाही शरीक केले नसते [१८] ४२

---

१) भाष्यकारांचा याच्यात मतभेद आहे की, ही दोन माणसे कोण होती? अल्लाहतआलाने समजाविण्यासाठी उदाहरण म्हणून त्यांची चर्चा केली आहे. की, खरोखर दोन माणसे अशी होती? जर होते तर, हे बनी इस्राईल मध्ये झालेत का मक्कावाल्यांमधून होते, यांच्यातून एक ईमानवाला आणि दुसरा काफिर होता.

२) ज्याप्रमाणे चार भिंतीमार्फत संरक्षण केले जाते, अशाचप्रकारे बागांच्या चाऱ्ही बाजूंना खजुरीचे वृक्ष होते; जे कुंपण आणि चार भिंतीचे काम देत असत.

३) म्हणजे दोन्ही बागांच्या दर्म्यान शेती होती. जिच्यांत धान्यांची पिके घेण्यात येत होती. अशा प्रकारे दोन्ही बागा धान्य आणि फळांनी पुरेपुर होते.

४) म्हणजे आपल्या उत्पन्नांत काही कमी करीत नव्हते, किंबहुना भरपूर उत्पन्न देत असत.
५) कारण की बागांना पाणी देण्यांस काही अडचण येऊ नये. किंवा पावसाळी इलाख्यांप्रमाणे पावसाची वाट पहाणारे नव्हते.
६) म्हणजे बागांच्या मालकाने, जो काफिर होता, आपल्या साथीदाराला सांगितले, जो ईमानवाला होता.
७) 'नफर' (जथ्थे) ने अभिप्रेत, संतती आणि नोकरचाकर आहेत.
८) म्हणजे तो काफिर, अहंकार आणि गर्वातच लिप्त नव्हतां, तर त्याची मस्ती आणि भविष्यांतील त्याच्या सुंदर सुंदर आणि लांबलचक आशांनी त्याला अल्लाहच्या पकडीपासून आणि चांगली कर्मे करण्यापासून गाफील करून टाकले. याशिवाय त्याने कयामतचाच इन्कार करून टाकला. मग धीटपणा दाखवत म्हटले की, जर कयामत आलीच तरी सुद्धा तेथे पण, सुपरीणाम माझ्या नशिबी येईल. ज्यांचे कुफ्र आणि अहंकार मर्यादेबाहेर निघून जातात, ते आपल्या मस्तीच्या नशेत असेच गर्विष्ठ दावे करीत असतात. जसे दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''जर मला अल्लाहकडे पलटाविले गेले, तर तेथे सुद्धा माझ्या करीता भलेच आहे.'' (हा मीम सजदा-५०) ''काय आपण त्या माणसाला पाहिले, ज्याने आमच्या निशाण्यांना नाकारले; आणि दावा केला की परलोकांत सुद्धा, संपत्ती आणि संतती देऊन मला गौरविण्यात येईल.'' (सू. मर्यम - ७७)
९) त्याच्या गोष्टी ऐकून त्याच्या ईमानवाल्या साथीदाराने, त्याला हितोपदेश करण्याच्या स्वरूपांत, समजाविले की तू आपल्या निर्माणकर्त्याच्या बरोबर, कुफ्र करीत आहे, ज्याने तुला माती आणि वीर्य बिंदुतून, निर्माण केले. मानवाचे पितामह, आदम عليه السلام मातीपासून निर्माण करण्यात आले होते. म्हणून माणसाचे मूळ, मातीच झाली. मग जवळचे कारण तो वीर्य बिंदू झाला, जो बापाच्या पाठीच्या मणक्यातून निघून आईच्या गर्भाशयांत गेला. तेथे नऊ महिने त्याचे पालन केले. मग त्याला पूर्ण माणूस बनवून, आईच्या पोटांतून काढले. काहींच्या जवळ, मातीतून निर्माण होण्याचा अर्थ, आहे की मनुष्य जे अन्न खातो, ते सर्व जमिनीतून, म्हणजे मातीपासूनच प्राप्त होते; याच अन्नातून तो वीर्य बिंदू बनतो, जो आईच्या गर्भाशयांत जाऊन मानवाच्या जन्माला कारणीभूत बनतो. असे पण प्रत्येक मनुष्याचे मूळ, मातीच ठरते. कृतघ्न माणसाला त्याचे मूळ (स्वरूप) आठवून देऊन, त्याला त्या निर्माण कर्त्याकडे आणि पालनकर्त्याकडे, लक्ष, ध्यान देवविले जात आहे. कीं, तू आपल्या वास्तवतेचा आणि मुळाचा विचार कर; आणि मग आपल्या पालनकर्त्याच्या उपकारांना पहा, की त्याने तुला कशापासून काय बनवून टाकले. आणि या निर्मितीच्या कामांत, त्याचा कोणी मददगार आणि भागिदार नाही. हे सर्व काही करणारा फक्त आणि फक्त तोच अल्लाहतआला आहे, ज्याला मानण्यासाठी तू तयार नाही. आह! कशाप्रकारे हा मनुष्य कृतघ्न आहे!!
१०) म्हणजे मी तुझ्यासारखी गोष्ट करणार नाही. परंतु मी तर अल्लाहचे पालकत्त्व आणि त्याच्या एकच होण्याला कबूल आणि मान्य करतो. याच्याने ठाऊक होते की, दुसरा साथीदार मुशरिक होता.
११) अल्लाहच्या देणग्यांचे आभार मानण्याची पद्धत दाखवित म्हटले की बागेत प्रवेश करते वेळी, गर्व आणि अहंकार दाखविण्याऐवजी, हे म्हटले असते माशाअ् अल्लाहु ला कुव्वता इल्लाह् बिल्लाह म्हणजे जे काही होते, अल्लाहच्या मर्जीनेच होते. तो इच्छेल तर त्याला बाकी ठेवेल. आणि इच्छेल त्याला नष्ट करून टाकेल. याचसाठी हदीसमध्ये येते की, ज्याला कोणी संपत्ती, संतती किंवा स्थिती चांगली वाटेल तर माशाअ अल्लाह् ला कुव्वता इल्लाह बिल्लाह् म्हणावयास पाहिजे. (तफसीर इब्ने कसीर)
१२) इहलोकात किंवा परलोकांत, किंवा, इहलोकात व परलोक, दोन्ही ठिकाणी.
१३) हुसबान, गुफरानच्या वजनावर, हिशेबाप्रमाणे आहे. म्हणजे अशी शिक्षा, जी कोणाच्या कर्तृत्वाच्या परिणामात होईल. म्हणजे आकाशी शिक्षेच्या द्वारे त्याने आत्मपरिक्षण करून घ्यावे. आणि ही जागा जेथे यावेळी टवटवीत आणि हिरवीगार बाग आहे, सपाट आणि खणखणीत मैदान होऊन जावा.
१४) किंवा दर्म्यानमध्ये जो पाट आहे, जो बागेला पाणी पाजण्याला आणि टवटवीत ठेवण्याला कारणीभूत आहे, त्याच्या पाण्याला इतके खोल उतारून देईल की, त्याच्यापासून पाणी मिळविणे अशक्य होऊन जाईल. आणि जेव्हा जास्त खोलवर उतरून जाईल, मग तेथे मोठमोठ्या हार्स पावरच्या मोटारी आणि इंजीने सुद्धा, पाण्याला वर आणून खेचण्याला असमर्थ असतात.
१५) हा इशारा आहे, बर्बाद होण्याचा. म्हणजे त्याचा सर्व बाग नष्ट करून टाकण्यात आला.
१६) म्हणजे बागा तयार करणे, त्याच्यांत सुधारणा करणे, आणि शेतीच्या खर्चावर, तो खेदाने हात चोळू लागला. हात चोळणे इशारा आहे पश्चात्ताप व्यक्त करण्याकडे.
१७) म्हणजे ज्या छत, छपरांवर द्राक्षांच्या वेली होत्या, ते सर्व जमिनीवर कोसळले, आणि द्राक्षांचे सर्व पीक बर्बाद होऊन गेले.
१८) आता त्याला जाणीव झाली की, अल्लाह बरोबर कोणाला भागीदार ठरविणे, त्याच्या देणग्यांनी उपकृत होऊन, त्याच्या हुकूमांना नाकारणे, आणि त्याच्या मुकाबल्यात अहंकार करणे, कुठल्याही प्रकारे एका मनुष्याला शोभत नाही. परंतु आता खेद करण्याचा काही फायदा पण नव्हता.

وَلَمْ تَكُنْ لَّهٗ فِئَةٌ يَّنْصُرُوْنَهٗ مِنْ دُوْنِ اللّٰهِ وَمَا كَانَ مُنْتَصِرًا ﴿٤٣﴾

**आणि त्याच्या मदतीला कोणी समूहपण उठून[१] उभा राहिला नाही की, अल्लाहपासून त्याचा बचाव करतां; न स्वत:च तो याचा बदला घेऊ शकत होता (४३)**

هُنَالِكَ الْوَلَايَةُ لِلّٰهِ الْحَقِّ ؕ هُوَ خَيْرٌ ثَوَابًا وَّخَيْرٌ عُقْبًا ﴿٤٤﴾

**यावरूनच (सिद्ध होते) की अधिकार[२] फक्त नेहमी राहणाऱ्या अल्लाहतआलासाठीच आहे; तो पुण्य फळ देण्यात आणि परिणामाच्या दृष्टीने[३], फारच उत्तम आहे. (४४)**

وَاضْرِبْ لَهُمْ مَّثَلَ الْحَيٰوةِ الدُّنْيَا كَمَآءٍ اَنْزَلْنٰهُ مِنَ السَّمَآءِ فَاخْتَلَطَ بِهٖ نَبَاتُ الْاَرْضِ فَاَصْبَحَ هَشِيْمًا تَذْرُوْهُ الرِّيٰحُ ؕ وَكَانَ اللّٰهُ عَلٰى كُلِّ شَيْءٍ مُّقْتَدِرًا ﴿٤٥﴾

**आणि त्यांच्यासमोर ऐहिक जीवनाचे उदाहरण पण वर्णन करून सांग; जसे पाणी आम्ही आकाशांतून वर्षविले, ज्याने जमीन प्रफुल्लीत होऊन जाते; मग शेवटी ती (वनस्पती) चुरा चुरा होऊन जाते; जिला वारा उडवून लावतो;..अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे[४]. (४५)**

اَلْمَالُ وَالْبَنُوْنَ زِيْنَةُ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۚ وَالْبٰقِيٰتُ الصّٰلِحٰتُ خَيْرٌ عِنْدَ رَبِّكَ ثَوَابًا وَّخَيْرٌ اَمَلًا ﴿٤٦﴾

**संपत्ती आणि संतती तर या जगाचीच शोभा आहे[५]. होय! परंतु बाकी रहाणारे पुण्य[६], तुझ्या पालनकर्त्याजवळ, पुण्यफळाच्या दृष्टीने आणि आशेच्या दृष्टीने पण फारच उत्कृष्ट आहे. (४६)**

१) ज्या जथ्थ्यावर त्याला अभिमान होता, तो पण त्याच्या काही कामा आला नाही. न तो स्वत:च अल्लाहच्या शिक्षेपासून वाचण्याची काही व्यवस्था करू शकला.

२) 'वलायत' चा अर्थ सहाय्य आणि मदतीचा आहे; म्हणजे या अवस्थेत प्रत्येक ईमानवाल्याला आणि काफिराला ठाऊक होऊन जाते की, अल्लाहच्या शिवाय कोणी, कोणाची मदत करण्यावर, आणि त्याच्या शिक्षेपासून वाचविण्यावर, समर्थ नाही. हेच कारण आहे की, मग अशा प्रसंगी मोठमोठे शिरजोर आणि ढंडेल लोक पण ईमान आणण्यावर लाचार होऊन जातात, जरी या वेळेचे ईमान आणणे नफा देणारे आणि कबूल नाही. ज्याप्रमाणे कुरआनाने फिरऔनच्या बाबतीत सांगितले, की जेव्हा तो बुडू लागला तर म्हणू लागला, ''मी त्या अल्लाहवर ईमान आणले, ज्यावर बनुइस्राईल ने ईमान ठेवले आहे.'' (सू.यूनुस-९०) दुसऱ्या काफिरांच्या बाबतीत फर्माविले, जेव्हा त्यांनी आमची शिक्षा पाहिली तेव्हा म्हणू लागले, ''आम्ही एक अल्लाहवर ईमान आणले, आणि ज्यांना आम्ही अल्लाहचे भागीदार ठरवीत होतो, त्यांना नाकारत आहोत'' (सू.मोमिन-८४)

३) म्हणजे तोच आपल्या मित्रांना उत्तम बदला देणारा, चांगल्या शेवटाने प्रतिष्ठा देणारा आहे.

४) या महावाक्यात या जगाचे क्षणभंगुरत्व आणि अत्यल्प काळाचे, शेतीच्या एका उदाहरणाने, स्पष्ट केले गेले आहे की, शेतीत लावलेल्या रोपांवर आणि वृक्षांवर जेव्हा आकाशांतून पावसाची वर्षा होते, तर पाणी मिळाल्याने शेती लहरून उठते. रोपटे आणि वृक्ष नवजीवनाने टवटवीत होतात. परंतु नंतर एक असा वेळ येतो की शेती वाळून जाते. पाण्याच्या कमतरतेमुळे किंवा शेती पिकून गेल्यामुळे, तेव्हा मग वारा तिला उडवत फिरतो. वाऱ्याचा एक झोका, कधी तिला उजवीकडे तर कधी डावीकडे झुकवतो. हे ऐहिक जीवन सुद्धा, वाऱ्याच्या एका झोका, किंवा पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे, किंवा शेतीप्रमाणे आहे, जे आपल्या थोड्या दिवसांची बहार दाखवून, निर्जीव होऊन जाते. आणि हे सर्व फेरबदल त्या व्यक्तीत्वाच्या हातात आहेत, जो एक आहे आणि सर्वशक्तिमान आहे. अल्लाहतआलाने जगाचे हे उदाहरण, कुरआन मजीदमध्ये अनेक ठिकाणी दिले आहे. उदा.सू.यूनुस-२५, सू.जुमर-२१, सू.हदीद - ५० वगैरे.

५) यांत त्या जगात रहणाऱ्यांचे खंडन आहे, जे ऐहिक साज व सामान, वंश आणि घराणे, आणि संततीवर गर्व करतात. अल्लाहतआलाने फर्माविले, या वस्तू तर या क्षणभंगुर जगाची तात्कालिक शोभा आहे.परलोकांत या वस्तू काही कामा येणार नाही. याचसाठी याच्यापुढे फर्माविले की, परलोकांत काम येणारी कर्मे, तर ती आहेत जी बाकी रहाणारी आहेत.

६) बाकीयातुससालेहात (बाकी राहणारी पुण्याची कामे) कोणती किंवा कोणकोणती आहेत? कोणी नमाजीला, कोणी अल्लाहची स्तुती करण्याला, पावित्र्य वर्णण्याला, त्याच्या श्रेष्ठत्वाला आणि उपास्य होण्याच्या वर्णन करण्याला, काहींनी आणखी भलाइच्या कामांना, याला पात्र ठरविले आहे. परंतु खरी गोष्ट ही आहे की, हे सर्व साधारण आहे आणि संपूर्ण पुण्याच्या कामांना शामील करते. सर्व फर्ज, आणि वाजिब, आणि सुन्नत आणि नफील, सर्व बाकियातुस्सालेहात आहेत. किंबहुना मना केलेल्या गोष्टीपासून वांचणे पण, एक चांगले काम आहे; ज्यावर अल्लाहजवळ पुण्यफळ मिळण्याची आशा आहे.

وَيَوْمَ نُسَيِّرُ الْجِبَالَ وَتَرَى الْأَرْضَ بَارِزَةً ۙ وَّحَشَرْنٰهُمْ
فَلَمْ نُغَادِرْ مِنْهُمْ أَحَدًا ﴿٤٧﴾

**आणि ज्या दिवशी आम्ही पर्वतांना चालवू लावू[१], आणि पृथ्वीला तू पाहशील की, खुले साफ मैदान आहे. आणि सर्व लोकांना आम्ही एकत्र गोळा करू, त्यांच्यातून एकालाही बाकी सोडणार नाही[२] ४७**

وَعُرِضُوْا عَلٰى رَبِّكَ صَفًّا ۗ لَقَدْ جِئْتُمُوْنَا كَمَا
خَلَقْنٰكُمْ أَوَّلَ مَرَّةٍۭ ۚ بَلْ زَعَمْتُمْ أَلَّنْ نَّجْعَلَ
لَكُمْ مَّوْعِدًا ﴿٤٨﴾

**आणि सर्वच्या सर्व तुझ्या पालनकर्त्यासमोर रांगेत, हजर केले जातील[३]. खचित्च, तुम्ही आमच्याजवळ, अशा प्रकारे आलात, ज्याप्रमाणे आम्ही तुम्हास, पहिल्या वेळेस निर्माण केले होते. परंतु तुम्ही याच कल्पनेत राहिलात, की आम्ही तुमच्यासाठी कोणी वायद्याचा वेळ निश्चित करणारच नाही. ४८**

وَوُضِعَ الْكِتٰبُ فَتَرَى الْمُجْرِمِيْنَ مُشْفِقِيْنَ
مِمَّا فِيْهِ وَيَقُوْلُوْنَ يٰوَيْلَتَنَا مَالِ هٰذَا الْكِتٰبِ
لَا يُغَادِرُ صَغِيْرَةً وَّلَا كَبِيْرَةً إِلَّآ أَحْصٰهَا ۚ
وَوَجَدُوْا مَا عَمِلُوْا حَاضِرًا ۗ وَلَا يَظْلِمُ رَبُّكَ
أَحَدًا ﴿٤٩﴾

**आणि कर्मपत्रे समोर ठेवून दिली जातील. मग तू पाहशील की, गुन्हेगार त्याच्या (लिखाणा) ने भयभित झालेले असतील. आणि म्हणत असतील की, हाय! आमचे दुर्भाग्य! की हे कसे पुस्तक आहे? ज्याने कोणी लहान मोठा (अपराध) नोंदविल्या शिवाय सोडला नाही. आणि जे काही त्यांनी केले होते, सर्व त्यांना आढळून येईल. आणि तुझा पालनकर्ता कोणावर जुलूम आणि अत्याचार करणार नाही ४९**

وَإِذْ قُلْنَا لِلْمَلٰٓئِكَةِ اسْجُدُوْا لِأٰدَمَ فَسَجَدُوْٓا
إِلَّآ إِبْلِيْسَ ۗ كَانَ مِنَ الْجِنِّ فَفَسَقَ عَنْ أَمْرِ
رَبِّهٖ ۗ أَفَتَتَّخِذُوْنَهٗ وَذُرِّيَّتَهٗٓ أَوْلِيَآءَ مِنْ دُوْنِيْ
وَهُمْ لَكُمْ عَدُوٌّ ۗ بِئْسَ لِلظّٰلِمِيْنَ بَدَلًا ﴿٥٠﴾

**आणि जेव्हा आम्ही देवदुतांना हुकूम दिला की, तुम्ही आदमच्या समोर सजदा करा; तेव्हा इब्लीस शिवाय, सर्वांनी सजदा करून घेतला; तो जिन्नांमधून होता[४]. त्याने आपल्या पालनकर्त्याचा आज्ञाभंग केला[५]. काय तरी सुद्धा तुम्ही त्याला आणि त्याच्या संततीला, मला सोडून आपला मित्र बनवीत आहात? वास्तविक तो तुम्हा सर्वांचा शत्रू आहे[६]. अशा जालीमांचा फारच वाईट बदला आहे[७]. ५०**

१) ही कयामतची भयावहता आणि मोठमोठ्या घटनांचे वर्णन आहे. पर्वतांना चालवू चा अर्थ, पर्वत आपल्या जागेवरून हटून जातील. आणि पिंजलेल्या कापसासारखे उडून जातील. 'व तकुनल जिबालु कल इहनिल मनफूश' (सू.कारिआ:-५) आणखी पहावे सू.तूर-९/१०, सू.नमल-८८, सू.ताहा-१०५/१०७ पृथ्वीवर जेव्हा पर्वतासारख्या मजबूत वस्तू नष्ट होऊन जातील; तर घरे, वृक्ष, यासारख्या दुसऱ्या वस्तूं, कशा प्रकारे आपले अस्तित्व कायम ठेवू शकतील? म्हणूनच पुढे सांगितले, ''तू जमिनीला साफ आणि मोकळी पाहशील.''

२) म्हणजे, सुरवातीचे आणि शेवटचे, लहान मोठे, काफिर व मोमिन, सर्वांना जमा करू, कोणी जमिनीच्या आंत, पडून राहणार नाही. आणि न कबरीतून निघून, कोण्याजागी लपूंशकेल.

३) याचा अर्थ आहे की, एकाच रांगेत, अल्लाहच्या समोर उभे राहतील. किंवा रांगाच्या स्वरूपांत अल्लाहच्या समक्ष हजर होतील.

४) कुरआनाच्या या खुलाशाने स्पष्ट करून दिले की, शैतान देवदूत नव्हता. देवदूत जर असता, तर अल्लाहच्या आज्ञेचा भंग करण्याची त्याची हिंमतच झाली नसती. कारण की देवदुतांचे वैशिष्टय, अल्लाहतआलाने सांगितले आहे की, ''ते अल्लाहच्या हुकुमाचा आज्ञाभंग करीत नाही. आणि तेच करतात ज्याचा त्यांना हुकूम देण्यात येतो.'' (सू.तहरीम-६) अशा स्वरूपांत अशी शंका येऊ शकते की, जर तो देवदूत नव्हता, तर तो अल्लाहच्या हुकूमाचा संबोधित्च नव्हता. कारण की, याचे संबोधित तर देवदूत होते, त्यांनाच तर सजदा करण्याचा हुकूम देण्यात आला होता. साहिबे रूहुल मआनीने म्हटले आहे की, तो देवदूत तर खचित्च नव्हता, परंतु तो देवदुतांबरोबर राहत असे. आणि त्यांच्यातच गणती केला जात असे. म्हणून तो सुद्धा 'उसजुदू लि आदम' च्या हुकूमाचा संबोधित होता. आणि आदमच्या सजद्याच्या हुकूमा बरोबर त्याला संबोधित करणे निस्चितच आले.

५) 'फिसक' चा अर्थ आहे, निघणे, उंदिर जेव्हा आपल्या बिळांतून निघतो, तर म्हणतात, फसकतल् फअत मिन् जुहरिहा. शैतान सुद्धा आदर सन्मानाचा सजदा करण्याचा इन्कार करून, पालनकर्त्याच्या आज्ञापालनांतून निघून गेला.

६) म्हणजे काय तुमच्यासाठी ते योग्य आहे की, तुम्ही अशा माणसाला आणि त्याच्या संततीला, मित्र बनवावे; जो तुमचे वडील आदमचा शत्रू, तुमचा शत्रू, आणि तुमच्या पालनकर्त्याचा शत्रू आहे; आणि अल्लाहला सोडून, या शैतानाचे आज्ञापालन करावे?

७) दुसरे भाषांतर याचे हे केले गेले आहे, ''जालिमांनी काय वाईट बदल अंगीकारला आहे.'' म्हणजे अल्लाहचे आज्ञापालन आणि त्याच्या दोस्तीला सोडून, शैतानाच्या आज्ञापालनाला आणि दोस्तीला जे अंगीकारले आहे, तर हा फारच वाईट बदल आहे, जो ह्या जालिमांनी अंगीकारला आहे.

مَآ اَشْهَدْتُّهُمْ خَلْقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَلَا خَلْقَ اَنْفُسِهِمْ ۖ وَمَا كُنْتُ مُتَّخِذَ الْمُضِلِّيْنَ عَضُدًا ﴿٥١﴾

**मी त्यांना, आकाश व पृथ्वीच्या निर्मितीच्या वेळेला, हजर ठेवले नव्हते; आणि न त्यांच्या स्वत:च्या निर्मितीच्या वेळी[१]. आणि मी बहकविणाऱ्यांना आपले बाहुबल बनविणारा पण नाही[२]. ५१**

وَيَوْمَ يَقُوْلُ نَادُوْا شُرَكَآءِيَ الَّذِيْنَ زَعَمْتُمْ فَدَعَوْهُمْ فَلَمْ يَسْتَجِيْبُوْا لَهُمْ وَجَعَلْنَا بَيْنَهُمْ مَّوْبِقًا ﴿٥٢﴾

**आणि ज्या दिवशी तो फर्माविल की, तुमच्या कल्पनेत जे माझे सरकतदार होते, त्यांना बोलवा! हे बोलावतील, पण त्यांच्यातून कोणी पण उत्तर देणार नाही. आणि आम्ही त्यांच्या दर्म्यान एक आड घालून टाकू[३]. ५२**

وَرَاَ الْمُجْرِمُوْنَ النَّارَ فَظَنُّوْٓا اَنَّهُمْ مُّوَاقِعُوْهَا وَلَمْ يَجِدُوْا عَنْهَا مَصْرِفًا ﴿٥٣﴾

**आणि गुन्हेगार लोक नरकाग्नीला पाहून, समजून जातील की, ते यांतच झोंकून दिले जातील; परंतु या पासून वाचवण्यासाठी कोणतीही जागा पावणार नाही[४]. ५३**

وَلَقَدْ صَرَّفْنَا فِيْ هٰذَا الْقُرْاٰنِ لِلنَّاسِ مِنْ كُلِّ مَثَلٍ ۭ وَكَانَ الْاِنْسَانُ اَكْثَرَ شَيْءٍ جَدَلًا ﴿٥٤﴾

**आणि आम्ही या कुरआनांत, प्रत्येक रीतीने, सर्वच्या सर्व उदाहरणे, लोकांकरीता सांगून दिली आहेत. परंतु मनुष्य सवति जास्त झगडणारा आहे[५]. ५४**

وَمَا مَنَعَ النَّاسَ اَنْ يُّؤْمِنُوْٓا اِذْ جَآءَهُمُ الْهُدٰى وَيَسْتَغْفِرُوْا رَبَّهُمْ اِلَّآ اَنْ تَاْتِيَهُمْ سُنَّةُ الْاَوَّلِيْنَ اَوْ يَاْتِيَهُمُ الْعَذَابُ قُبُلًا ﴿٥٥﴾

**आणि लोकांजवळ सन्मार्ग, येऊन चुकल्यानंतर, त्यांना ईमान आणण्यात, आणि आपल्या पालनकर्त्याजवळ क्षमायाचना करण्यापासून, फक्त या गोष्टीने मना केले आहे की, पूर्वीच्या लोकांसारखा मामला, त्यांना पण समोर यावा[६]; किंवा त्यांच्यासमोर स्पष्टपणे शिक्षा येऊन ठेपावी[७] ५५**

१) म्हणजे आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, आणि त्यांचे व्यवस्थापनांत किंवा स्वत: त्या शैतानांच्या निर्मितीमध्ये, न त्याची, किंवा त्याच्यांतून कोणा एकाची मदत मिळवीली नाही. हे तरी त्यावेळी अस्तित्वात पण नव्हते. मग तुम्ही हा शैतान आणि त्याच्या संततीची पुजा, किंवा त्यांचे आज्ञापालन का करतात? आणि माझ्या उपासने आणि आज्ञापालनापासून पळ काढणे, का आहे? जेव्हा की, ही माझी निर्मिती आहे, आणि मी त्या सर्वांचा निर्माता आहे.

२) आणि मी त्यांना आपला मदद्गार पण कसा बनवू? जेव्हा की हे माझ्या सेवकांना मार्गभ्रष्ट करून, माझा स्वर्ग, आणि माझ्या प्रसन्नतेने रोकतात.

३) 'मौबिक' चा एक अर्थ परदा आणि आडचा केला गेला आहे. म्हणजे त्यांच्या दर्म्यान पडदा आणि अंतर करून दिले जाईल. कारण की त्यांचे आपसात शत्रुत्व असेल. केवळ यासाठी की, हशरच्या मैदानांत, त्यांनी एक दुसऱ्याला भेटू नये काही म्हणतात की, ही नरकाग्नी मध्ये रक्त आणि पुवांची एक विशिष्ट दरी आहे. आणि काहींनी याचे भाषातर 'मुहलक' (म्हणजे नष्ट होण्याची जागा) केला आहे, जसे की भाषांतराने स्पष्ट आहे. म्हणजे हे मुशरिक आणि त्यांचे सर्व उपास्य, हे एक दुसऱ्याला भेटूच शकणार नाहीत. कारण की त्यांच्या दर्म्यान बर्बादीचा सामान आणि भयावह वस्तू असतील.

४) ज्याप्रमाणे काही रिवायतींमध्ये आहे की, काफिर अजून चाळीस वर्षाच्या प्रवासाच्या अंतरावर असेल, तर त्याला ठाऊक होऊन जाईल की, जहन्नमच त्याचे ठिकाण आहे. (मुसनद अहमद)

५) म्हणजे आम्ही माणसांना सत्याचा मार्ग समजविण्यासाठी, कुरआनांत प्रत्येक पद्धत उपयोगांत आणली आहे. उपदेश आणि चित्तशुद्धी, उदाहरणे आणि घटना,प्रमाणे आणि पुरावे. याच्याशिवाय त्यांना वारंवार आणि वेगवेगळ्या दृष्टीकोनातून वर्णन करून दिले आहे, परंतु मनुष्य फारच झगडाळू आहे; म्हणून हितोपदेशाचा त्याच्यावर परिणाम होत नाही आणि प्रमाणे आणि निशाण्या, त्याच्यासाठी लाभदायक होत नाही.

६) म्हणजे खोटे ठरवल्यामुळे, त्यांच्यावर अशाप्रकारे शिक्षा आल्या, जशा पूर्वीच्या लोकांवर आल्यात.

७) म्हणजे हे मक्केवाले, ईमान आणण्यासाठी, दोन गोष्टींपैकी, कोण्या एका गोष्टीची वाट पाहत आहेत. परंतु या बुद्धीच्या मारलेल्यांना, हे ठाऊक नाही की, याच्यानंतर ईमानाची काही किंमतच नाही. किंवा याच्यानंतर यांना ईमान आणण्याची संधी पण मिळणार नाही.

وَمَا نُرْسِلُ الْمُرْسَلِيْنَ اِلَّا مُبَشِّرِيْنَ وَمُنْذِرِيْنَ ۚ وَيُجَادِلُ الَّذِيْنَ كَفَرُوْا بِالْبَاطِلِ لِيُدْحِضُوْا بِهِ الْحَقَّ وَاتَّخَذُوْٓا اٰيٰتِيْ وَمَآ اُنْذِرُوْا هُزُوًا ﴿٥٦﴾

आणि आम्ही तर आमच्या पैगंबरांना फक्त यासाठी पाठवितो की, त्यांनी शुभवर्तमान ऐकवून द्यावे, आणि भिववून द्यावे; काफिर लोक खोट्या गोष्टींना सनद बनवून, झगडे करतात आणि (इच्छितात) की, यामुळे सत्याला डळमळीत करून द्यावे. ते माझ्या निशाण्यांस, आणि ज्या गोष्टीपासून त्यांना भिवविण्यांत येते, त्याला हंशी खेळ बनवून ठेवला आहे[१]. (٥٦)

وَمَنْ اَظْلَمُ مِمَّنْ ذُكِّرَ بِاٰيٰتِ رَبِّهٖ فَاَعْرَضَ عَنْهَا وَنَسِيَ مَا قَدَّمَتْ يَدٰهُ ۗ اِنَّا جَعَلْنَا عَلٰى قُلُوْبِهِمْ اَكِنَّةً اَنْ يَّفْقَهُوْهُ وَفِيْٓ اٰذَانِهِمْ وَقْرًا ۗ وَاِنْ تَدْعُهُمْ اِلَى الْهُدٰى فَلَنْ يَّهْتَدُوْٓا اِذًا اَبَدًا ﴿٥٧﴾

आणि याच्यापेक्षा आणखी जास्त जुलुमी कोण आहे? ज्याला त्याच्या पालनकर्त्याच्या महावाक्यांनी उपदेश केला जावा, तरी सुद्धा तो विन्मुख रहावा; आणि जे काही त्याच्या हातांनी, पुढे पाठवून ठेवले आहे, त्याला विसरून जावे. नि:संशय आम्ही त्यांच्या अंत:करणावर, त्याच्या समजण्यापासून परदे टाकून ठेवले आहेत, आणि त्यांच्या कानांत दट्टे आहेत. जरी तू त्यांना हिदायतकडे बोलावित राहिलास तरी ते कधीही हिदायत मिळविणार नाहीत[२] (٥٧)

وَرَبُّكَ الْغَفُوْرُ ذُو الرَّحْمَةِ ۗ لَوْ يُؤَاخِذُهُمْ بِمَا كَسَبُوْا لَعَجَّلَ لَهُمُ الْعَذَابَ ۗ بَلْ لَّهُمْ مَّوْعِدٌ لَّنْ يَّجِدُوْا مِنْ دُوْنِهٖ مَوْئِلًا ﴿٥٨﴾

आणि तुझा पालनकर्ता फारच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे; तो जर त्यांच्या कर्मांच्या शिक्षेत यांना पकडेल तर नि:संशय त्यांना लवकर शिक्षा देईल. किंबहुना त्यांच्यासाठी एक वायद्याचा वेळ निश्चित आहे, ज्यापासून सरकण्याची, ते जागा पावणार नाही[३] (٥٨)

وَتِلْكَ الْقُرٰٓى اَهْلَكْنٰهُمْ لَمَّا ظَلَمُوْا وَجَعَلْنَا لِمَهْلِكِهِمْ مَّوْعِدًا ﴿٥٩﴾

आणि या आहेत त्या वस्त्या, ज्यांना आम्ही त्यांच्या जुलमाच्या आधारावर, नष्ट करून टाकले. आणि त्यांच्या बर्बाद होण्याची सुद्धा, एक निश्चित वेळ नक्की करून ठेवली होती[४] (٥٩)

وَاِذْ قَالَ مُوْسٰى لِفَتٰىهُ لَآ اَبْرَحُ حَتّٰٓى اَبْلُغَ مَجْمَعَ الْبَحْرَيْنِ اَوْ اَمْضِيَ حُقُبًا ﴿٦٠﴾

आणि जेव्हा मूसाने आपल्या तरूण[५] साथीदाराला सांगितले की, मी तर चालतच राहील, येथ पावेतो की दोन समुद्राच्या मिळण्याच्या[६] जागेवर पोहचेल, जरी मला वर्षानुवर्षे चालावे लागेल[७] (٦٠)

فَلَمَّا بَلَغَا مَجْمَعَ بَيْنِهِمَا نَسِيَا حُوْتَهُمَا فَاتَّخَذَ سَبِيْلَهٗ فِي الْبَحْرِ سَرَبًا ﴿٦١﴾

जेव्हा ते दोन्ही तेथे पोहचले, जेथे दोन्ही समुद्र मिळण्याची जागा होती. तेथे आपला मासा विसरून गेले, ज्याने समुद्रांत भुयारासारखा आपला रस्ता बनवून घेतला (٦١)

فَلَمَّا جَاوَزَا قَالَ لِفَتٰىهُ اٰتِنَا غَدَآءَنَا ۫ لَقَدْ لَقِيْنَا مِنْ سَفَرِنَا هٰذَا نَصَبًا ﴿٦٢﴾

जेव्हा हे दोघे तेथून पुढे चालले, तेव्हा मूसाने आपल्या तरूण साथीदारांस सांगितले की, आण, आमची न्याहरी दे; आम्हाला तर या प्रवासाने फारच त्रास झाला आहे (٦٢)

قَالَ اَرَءَيْتَ اِذْ اَوَيْنَآ اِلَى الصَّخْرَةِ فَاِنِّيْ نَسِيْتُ الْحُوْتَ ۫ وَمَآ اَنْسٰنِيْهُ اِلَّا الشَّيْطٰنُ اَنْ اَذْكُرَهٗ ۚ وَاتَّخَذَ سَبِيْلَهٗ فِي الْبَحْرِ ۖ عَجَبًا ﴿٦٣﴾

त्याने सांगितले की काय आपण पाहिले? जेव्हाकी तुम्ही दगडाला टेकून आराम करीत होता, तेथेच मी मासा विसरून गेलो होतो, वास्तविक शैतानानेच मला विसर पाडला, की मी याचा उल्लेख आपणाजवळ करावा. या माशाने, एका अजब रीतीने समुद्रांत[८] आपला मार्ग करून घेतला. (٦٣)

१) आणि अल्लाहच्या महावाक्यांची टिंगल टवाळी करणे, ही खोटी ठरविण्याचा एक वाईट प्रकार आहे. अशाचप्रकारे निरर्थक गोष्टीत झगडा करणे, च्या मार्फत म्हणजे चुकीच्या पद्धती अंगीकार करून. सत्त्याला असत्य सिद्ध करण्याचा प्रयत्न करणे पण फारच घृणास्पद कृत्य आहे. या असत्त्याच्या भांडणाचा एक प्रकार हा आहे, जे काफिर पैगंबरांना सांगून, त्यांच्या पैगंबरीला नाकारत आले आहे की, तुम्ही तर आमच्याच सारखी माणसे आहांत. 'मा अन्तुम इल्ला बशरूम मिस्लुना' (सू.यासिन-१५) आम्ही तुम्हांस पैगंबर म्हणून कसे मान्य करावे? 'दहज' चा खरा अर्थ घसरण्याचा आहे. म्हटले जाते, 'दहजत् रिज्लुहु' (त्याचा पाय घसरून गेला.) येथून, हे कोण्या गोष्टीचा ऱ्हास

(टळणे) आणि बर्बाद होण्याच्या अर्थांत वापरला जाऊ लागला.
२) म्हणजे यांच्या या मोठ्या जुलुमामुळे, यांनी पालनकर्त्याच्या निशाण्यांना नाकारले. आणि आपल्या कर्तृत्वाला विसरून गेले. यांच्या अंत:करणावर असे परदे, आणि त्यांच्या कानांत असे दट्टे, टाकून देण्यांत आले, ज्यामुळे कुरआनाचे ऐकणे, समजणे, आणि त्यापासून हिदायत मिळविणे, त्यांच्यासाठी अशक्य होऊन गेले. त्यांना कितीही हिदायतकडे बोलवा! हे कधीही हिदायतचा मार्ग अनुसरण्यास तयार होणार नाहीत.
३) म्हणजे ही तर क्षमा करणाऱ्या पालनकर्त्याची दया आहे की, तो अपराधांवर लगेच पकड करीत नाही; किंबहुना सवलत देतो; जर असे झाले नसते, तर आपल्या कुकर्माच्या परिणामांत प्रत्येक मनुष्य, अल्लाहच्या शिक्षेच्या पकडीत कसला गेला असता. तथापि हे अवश्य आहे की, जेव्हा कर्म करण्याची सवलत संपून जाते, आणि बर्बाद होण्याचा वेळ येऊन ठेपतो, जो अल्लाहने निश्चित करून ठेवला आहे, तर पळून जाण्याचा कोणी मार्ग आणि बचावाचे काही साधन, त्यांच्याकरीता राहत नाही.
४) याच्याने अभिप्रेत, आद, समूद आणि ह.शोएब عليه السلام व ह.लूत عليه السلام वगैरे चे लोक आहेत. जे हिजाजवाल्यांच्या जवळ, आणि त्यांच्या मार्गावरच होते. त्यांना सुद्धा जरी त्यांच्या जुलुमामुळे, नष्ट करण्यात आले; परंतु नष्ट होण्यापूर्वी त्यांना पूर्ण संधी दिली गेली, आणि जेव्हा ही गोष्ट स्पष्ट होऊन गेली की त्यांचा जुलूम आणि अहंकार या मर्यादेपर्यंत पोहचले आहेत, जेथून हिदायतचे मार्ग बिल्कूल बंद होऊन जातात; आणि त्यांच्याकडून चांगुलपणाची आणि भलाईची काही आशा बाकी राहिली नाही, तेव्हा मग कर्म करण्याची संधी संपून जाते आणि बर्बादीचा वेळ सुरू होऊन जातो. मग त्यांना चुकीच्या अक्षरासारखे पुसून टाकण्यात आले. किंवा जगासाठी, धडा घेण्याचा नमुना बनवून देण्यांत आला. हे वास्तविक मक्केवाल्यांना समजाविण्यात येत आहे की, तुम्ही आमचे शेवटचे पैगंबर, आणि पैगंबरांमध्ये प्रतिष्ठीत, हजरत मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला नाकारत आहांत, तुम्ही असे समजू नये की, तुम्हाला जो अवकाश मिळत आहे, तर त्याचा अर्थ हा आहे की, तुम्हास कोणी विचारणारा नाही? किंबहुना हा अवकाश तर अल्लाहची रीत आहे; जी एका ठराविक वेळेपर्यंत, प्रत्येक व्यक्तीला, समूहाला, आणि समाजाला, दिला जातो. जेव्हा ही मुदत संपून जाईल आणि तुम्ही आपल्या कुफ्र आणि अहंकारापासून परावृत्त होणार नाहीत. तर तुमचा शेवटपण यापेक्षा वेगळा होणार नाही, जो तुमच्या पूर्वीच्या लोकांचा होऊन चुकला आहे.
५) नवजवानने अभिप्रेत ह.यूशा बिन नून आहेत; जे ह.मूसा عليه السلام च्या मृत्युनंतर त्यांचे वारसदार झालेत.
६) कोण्या खात्रीशीर साधनाने, या ठिकाणाच्या बाबतीत, काही माहित होऊ शकले नाही. तथापि सांकेतीक तगादा हा आहे की, याच्याने अभिप्रेत सीना वाळवंटाचे दक्षिणी भूशीर आहे, जेथे अकबा उपसागर आणि स्वेस उपसागर, दोन्ही येऊन मिळतात. आणि अहमरच्या समुद्रांत विसर्जीत होऊन जातात.
७) 'हुकुब्' चा एक अर्थ ७० किंवा ८० वर्षे, आणि दुसरा अर्थ, अनिश्चित मुदतीचा आहे. येथे हाच अर्थ अभिप्रेत आहे. म्हणजे जो पर्यंत मी, जेथे दोन्ही समुद्र मिळतात, तेथे पोहचून जाणार नाही, चालत राहील. आणि प्रवास अव्याहत चालु ठेवीन. मग किती का वेळ लागेना! ह.मूसा عليه السلام ला हा प्रवास यासाठी करावा लागला, की त्यांनी एका प्रसंगी, एका प्रश्नकर्त्याच्या उत्तरांत, असे सांगून टाकले की, यावेळी माझ्याशिवाय कोणी मोठा ज्ञानी नाही. अल्लाहतआलाला त्यांचे हे वाक्य आवडले नाही; आणि वह्य च्या मार्फत त्यांना सूचना दिली की, माझा एक सेवक (खिज्र) आहे; जो तुझ्यापेक्षा सुद्धा जास्त ज्ञानी आहे. ह.मूसा عليه السلام ने विचारले, हे अल्लाह! त्याची भेट कशा प्रकारे होऊं शकते? अल्लाहतआलाने फर्माविले, जेथे दोन समुद्र मिळतात, तेथेच आमचा सेवकपण असेल. तसेच फर्माविले की, मासा बरोबर घेऊन जा. जेव्हा मासा तुमच्या टोपलीतून निघून, गायब होऊन जाईल, तर समजून घ्यावे की हेच ते ठिकाण आहे. (स.बुखारी सू.कहफ) म्हणून या हुकूमाप्रमाणे, त्यांनी एक मासा घेतला, आणि प्रवास सुरू करून दिला.
८) म्हणजे मासा जिवंत होऊन, समुद्रांत चालला गेला. आणि त्याच्यासाठी अल्लाहने समुद्रांत भुयारासारखा रस्ता बनवून दिला. ह.यूशा عليه السلام ने माशाला समुद्रांत जातांना आणि मार्ग बनत असता पाहिले, परंतु ह.मूसा عليه السلام ला सांगावयाचे विसरून गेले. येथपावेतो की, विश्रांती घेऊन पुन्हा प्रवास सुरू केला. त्यादिवशी आणि नंतर रात्रभर, प्रवास करून, जेव्हा दुसऱ्या दिवशी ह.मूसा ला, थकवा आणि भूक जाणवली तेव्हांआपल्या जवान साथीदाराला म्हटले की, आण गड्या! न्याहरी तर करून घेऊ! तो म्हणाला, मासा, तर जेथे आम्ही दगडाला टेकून आराम केला होता, तेथे जिवंत होऊन समुद्रांत चालला गेला होता. आणि तेथे विचित्र पद्धतीने आपला रस्ता धरला होता. ज्याची मी आपणाशी चर्चा करण्याला विसरून गेलो होतो. आणि शैतानाने मला विसर पाडला.

قَالَ ذٰلِكَ مَا كُنَّا نَبْغِ ۖ فَارْتَدَّا عَلٰٓى اٰثَارِهِمَا قَصَصًا ۝٦٤

मूसाने म्हटले हेच तर होते ज्याच्या शोधांत आम्ही होतो. म्हणून तेथूनच आपल्या पाऊल खुणा शोधत शोधत, परत फिरले[१] ६४

فَوَجَدَا عَبْدًا مِّنْ عِبَادِنَآ اٰتَيْنٰهُ رَحْمَةً مِّنْ عِنْدِنَا وَعَلَّمْنٰهُ مِنْ لَّدُنَّا عِلْمًا ۝٦٥

मग आमच्या सेवकामधून, एका सेवकाला तेथे पावले[२]; ज्याला आम्ही आपल्या जवळची खास रहमत देऊन ठेवली[३] होती. आणि त्याला आपल्या जवळचे खास[४] ज्ञान शिकवून ठेवले होते. ६५

قَالَ لَهٗ مُوْسٰى هَلْ اَتَّبِعُكَ عَلٰٓى اَنْ تُعَلِّمَنِ مِمَّا عُلِّمْتَ رُشْدًا ۝٦٦

त्याला मूसाने म्हटले की मी आपली ताबेदारी करू? की आपण मला ते चांगले ज्ञान शिकवावे, जे आपणांस शिकविण्यांत आले आहे. ६६

قَالَ اِنَّكَ لَنْ تَسْتَطِيْعَ مَعِيَ صَبْرًا ۝٦٧

त्याने सांगितले की तुम्ही माझ्याबरोबर कधीच सहनशीलता पत्करूंशकत नाही. ६७

وَكَيْفَ تَصْبِرُ عَلٰى مَا لَمْ تُحِطْ بِهٖ خُبْرًا ۝٦٨

आणि ज्या गोष्टीचे आपणास काही ज्ञान नाही[५], त्यावर तुम्ही कशा सहनशिलता पत्करू शकता? ६८

قَالَ سَتَجِدُنِيْٓ اِنْ شَآءَ اللّٰهُ صَابِرًا وَّلَآ اَعْصِيْ لَكَ اَمْرًا ۝٦٩

मूसाने उत्तर दिले की, इन्शा अल्लाह आपण मला सहनशील पावाल. आणि कोण्या गोष्टीत आपला आज्ञाभंग करणार नाही ६९

قَالَ فَاِنِ اتَّبَعْتَنِيْ فَلَا تَسْـَٔلْنِيْ عَنْ شَيْءٍ حَتّٰٓى اُحْدِثَ لَكَ مِنْهُ ذِكْرًا ۝٧٠ ع ٩/١١/٢١

९/११/२१ त्याने म्हटले ठीक आहे! जर आपण माझ्या बरोबर चालण्याचाच आग्रह करीत आहे, तर लक्षात ठेवा, कोण्याही वस्तुच्या बाबतीत मला काहीही विचारू नये; जोपर्यंत मी स्वत: या बाबतीत काही सांगणार नाही ७०

فَانْطَلَقَا ٚ حَتّٰٓى اِذَا رَكِبَا فِى السَّفِيْنَةِ خَرَقَهَا ۭ قَالَ اَخَرَقْتَهَا لِتُغْرِقَ اَهْلَهَا ۚ لَقَدْ جِئْتَ شَيْـًٔا اِمْرًا ۝٧١

मग ते दोघे चालले, येथ पावेतो की एका नावेत स्वार झालेत. खिजर्‌ने यासाठी तिच्या पाट्या तोडून टाकल्या. मूसाने म्हटले काय तू तिला तोडत आहे, नावेवाल्यांना बुडून टाकावे हे तर तू फारच (तऱ्हेवाईक)[६] काम केलेस! ७१

قَالَ اَلَمْ اَقُلْ اِنَّكَ لَنْ تَسْتَطِيْعَ مَعِيَ صَبْرًا ۝٧٢

खिजरने उत्तर दिले की, मी तर पूर्वीच तुला सांगून दिले होते की, तू माझ्याबरोबर कदाचित सहन करू शकणार नाही. ७२

قَالَ لَا تُؤَاخِذْنِيْ بِمَا نَسِيْتُ وَلَا تُرْهِقْنِيْ مِنْ اَمْرِيْ عُسْرًا ۝٧٣

मूसाने म्हटले की, माझ्या चुकीवर (कृपया) मला पकडू नये. आणि माझ्यावर इतकी सक्ती पण करू नकोस[७] ७३

فَانْطَلَقَا ٚ حَتّٰٓى اِذَا لَقِيَا غُلٰمًا فَقَتَلَهٗ ۙ قَالَ اَقَتَلْتَ نَفْسًا زَكِيَّةًۢ بِغَيْرِ نَفْسٍ ۭ لَقَدْ جِئْتَ شَيْـًٔا نُّكْرًا ۝٧٤

मग दोघे पुढे चालले, येथपावेतो की, त्यांना एक मुलगा[८] भेटला. खिजर्‌ ने त्याला मारून टाकले. मूसाने म्हटले की काय, तू एका पवित्र जीवाला कुठल्याही 'किसास' शिवाय मारून टाकलेस? आपण नी तर ही फार वाईट गोष्ट केली[९] ७४

१) ह.मूसा عليه السلام नी म्हटले, अल्लाहच्या बंद्या! जिथे माशाने जिवंत होऊन गायब होणे होते, तेच तर आमचे इच्छित ठिकाण होते; ज्याच्या शोधांत आम्ही प्रवास करीत आहोत. म्हणून ते आपल्या पाऊलखुणा बघत बघत मागे फिरले. आणि त्याच समुद्रांच्या संगमावर परत आले. कससा चा अर्थ आहे मागे लागणे; मागे मागे चालणे. म्हणजे पाऊलखुणा बघत बघत त्यांच्या मागे मागे चालत राहिले.

२) या सेवकाने अभिप्रेत ह.खिजर्‌ عليه السلام आहेत. जसा की सहीह अहादीस मध्ये खुलासा आहे. खिजर्‌चा अर्थ, 'सदा हरीत आणि टवटवीत' असा आहे. हे एकदा पांढऱ्या जमिनीवर बसले, तर त्यांच्या खालचा तो जमिनीचा भाग,

हिरवागार होऊन, डोलू लागला. त्याचमुळे त्यांचे नांव खिजर् पडून गेले. (स.बुखारी तफसीर सू.कहफ)
३) 'रहमत' ने काही भाष्यकारांनी, ते विशिष्ट ईनाम अभिप्रेत धरले आहेत, जे अल्लाहने आपल्या त्या खास सेवकांवर केले होते. आणि बहुतेक भाष्यकारांनी याच्याने अभिप्रेत पैगंबरी घेतली आहे.
४) याच्याने पैगंबरीच्या ज्ञानाशिवाय, ज्याच्याने ह.मूसा عليه السلام पण लाभान्वयीत होते. काही निर्मितीच्या कामांचे ज्ञान, जे अल्लाहतआलाने फक्त ह.खिजर् عليه السلام ला दिले होते, ह.मूसा عليه السلام जवळ पण ते ज्ञान नव्हते. याच्याने आधार घेत काही सूफी दावा करतात की, अल्लाहतआला काही लोकांना, जे पैगंबर नसतात, असे ज्ञान, शिकल्या शिवाय, इच्छा केल्याशिवाय देऊन टाकतो. जे गुरूशिवाय केवळ, ज्ञात करणाऱ्या म्हणजे अल्लाहच्या कृपेचा परिणाम असतो. आणि हे अन्दुरूनी ज्ञान, धर्मशास्त्राच्या जाहीर ज्ञानाने, जे कुरआन आणि हदीस मध्ये आढळून येते, वेगळे, किंवा पुष्कळ वेळेस, याच्या विरूद्ध आणि टकराव करणारे असते. परंतु हा आधार घेणे यासाठी बरोबर नाही की, ह.खिजर् عليه السلام च्या बाबतीत स्वत: अल्लाहतआलाने त्यांना खास ज्ञान दिल्याचा खुलासा करून दिला आहे. जेव्हांकी, आणखी कोणासाठी असा खुलासा कोठेच नाही. जर याला सर्वसाधारण (आम) करून दिले जाईल, तर मग प्रत्येक हातचलाखी करणारा अशा प्रकारचा दावा करू शकतो. म्हणून या वर्गात हा दावा सर्वच करतात. म्हणून अशा दाव्यांना काहीही अर्थ नाही.
५) म्हणजे ज्याचे पूर्ण ज्ञान नसेल.
६) ह.मूसा عليه السلام ला कारण की, त्या खास ज्ञानाची कल्पना नव्हती, ज्यासाठी ह.खिजर् عليه السلام नी नावेच्या पाट्या तोडून टाकल्या होत्या. म्हणून दम धरू शकले नाहीत. आणि आपल्या ज्ञान आणि समजानुसार त्याला फारच भयंकर काम ठरविले. 'इमरन' चा अर्थ आहे. ''फारच भयावह काम.''
७) म्हणजे माझ्याशी सोपा मामला करावा सक्तीचा नाही.
८) गुलामने अभिप्रेत नवतरूण पण होऊं शकतो, आणि लहान मूल पण.
९) असे मोठे वाईट काम, ज्याला धर्मशास्त्रांत स्थान नाही. काहींनी म्हटले आहे की, याचा अर्थ आहे पहिल्या कामा (नांवेच्या पाट्यातोडणे) पेक्षा जास्त, वाईट काम. यासाठी की खून असे काम आहे ज्याची भरपाई आणि निर्सन शक्य नाही. जेव्हा की नावेच्या पाट्या उखडून टाकणे, असे काम आहे ज्याची भरपाई आणि निर्सन केले जाऊ शकते. काहींनी याचा अर्थ असा केला आहे, पहिल्या कामापेक्षा कमी दर्जाचे, यासाठी की, एका जीवाला ठार करणे, सर्व नाववाल्यांना बुडवून टाकण्यापेक्षा, कमी दर्जाचे आहे. (फत्हुल कदीर) परंतु पहिला भावार्थच, जास्त योग्य आहे. कारण की ह.मूसा عليه السلام ला जे धर्मशास्त्राचे ज्ञान अवगत होते, त्याच्या अनुषंगाने, ह.खिजर عليه السلام चे हे काम, कुठल्याही परिस्थितीत शरीअतच्या विरूद्ध होते. ज्यामुळे त्यांनी आक्षेप घेतला; आणि त्याला फारच वाईट काम ठरविले. तथापी ह. खिज़र عليه السلام अल्लाहच्या हुकूमामुळे हे काम करण्यासाठी ते बांधिल होते. आणि मूसा عليه السلام यापासून अपरिचित होते.

قَالَ اَلَمْ اَقُلْ لَّكَ اِنَّكَ لَنْ تَسْتَطِيْعَ مَعِيَ صَبْرًا ﴿٧٥﴾

**ते म्हणू लागले, की मी तुम्हास सांगितले नव्हते की, तुम्ही माझ्याबरोबर राहून, अजिबात दम धरू शकत नाही.** (७५)

قَالَ اِنْ سَاَلْتُكَ عَنْ شَيْءٍۢ بَعْدَهَا فَلَا تُصٰحِبْنِيْ ۚ قَدْ بَلَغْتَ مِنْ لَّدُنِّيْ عُذْرًا ﴿٧٦﴾

**मूसा (अ.) म्हणाले, जर आता, याच्यानंतर मी, जर कोण्या गोष्टीच्या बाबत विचारेन, तर नि:संशय आपण मला आपल्या बरोबर ठेवू नये. खचित्च माझ्याकडून तुम्ही सबबीला[१] पोहचून चुकला** (७६)

فَانْطَلَقَا ٚ حَتّٰٓى اِذَآ اَتَيَآ اَهْلَ قَرْيَةِ ِۨاسْتَطْعَمَآ اَهْلَهَا فَاَبَوْا اَنْ يُّضَيِّفُوْهُمَا فَوَجَدَا فِيْهَا جِدَارًا يُّرِيْدُ اَنْ يَّنْقَضَّ فَاَقَامَهٗ ؕ قَالَ لَوْ شِئْتَ لَتَّخَذْتَ عَلَيْهِ اَجْرًا ﴿٧٧﴾

**मग ते दोघे (पुढे) चालले, एका गांववाल्याजवळ येऊन त्यांच्याजवळ जेवण मागितले. त्यांनी त्यांचा पाहुणचार करण्याला साफ नकार दिला[२]. दोघांना तेथे एक भिंत दिसली, जी पडावयास आली होती. त्याने तिला ठीक आणि दुरूस्त[३] करून दिले. मूसा अ. म्हणू लागले, जर आपण इच्छिता, तर यावर मजुरी घेऊन घेतां[४]** (७७)

قَالَ هٰذَا فِرَاقُ بَيْنِيْ وَبَيْنِكَ ۚ سَاُنَبِّئُكَ بِتَاْوِيْلِ مَا لَمْ تَسْتَطِعْ عَّلَيْهِ صَبْرًا ﴿٧٨﴾

**त्याने म्हटले बस हे आता वेगळे होणे आहे, तुझ्यात आणि माझ्या दर्म्यान[५]. आता मी तुला या गोष्टींचे मूळ स्वरूप पण दाखवून देईन, ज्यावर तुला दम धरतांआला नाही[६]** (७८)

اَمَّا السَّفِيْنَةُ فَكَانَتْ لِمَسٰكِيْنَ يَعْمَلُوْنَ فِي الْبَحْرِ فَاَرَدْتُّ اَنْ اَعِيْبَهَا وَكَانَ وَرَآءَهُمْ مَّلِكٌ يَّاْخُذُ كُلَّ سَفِيْنَةٍ غَصْبًا ﴿٧٩﴾

**ती नाव तर काही गरीब लोकांची होती, जे समुद्रात कामकाज करत असत. मी तिच्यात काही तोड फोड करण्याचा इरादा करून घेतला. कारण की त्यांच्या पुढे एक बादशाह होता, जो बळजबरीने प्रत्येक (चांगल्या) नावेला जप्त करून घेत असे.** (७९)

وَاَمَّا الْغُلٰمُ فَكَانَ اَبَوٰهُ مُؤْمِنَيْنِ فَخَشِيْنَآ اَنْ يُّرْهِقَهُمَا طُغْيَانًا وَّكُفْرًا ﴿٨٠﴾

**आणि त्या तरूण मुलाचे आईबाप ईमानवाले होते. आम्हांस भीती वाटली की, कोठे हा आपल्या शिरजोरी आणि कुफ्रने त्यांना लाचार आणि परेशान न करून टाको** (८०)

فَاَرَدْنَآ اَنْ يُّبْدِلَهُمَا رَبُّهُمَا خَيْرًا مِّنْهُ زَكٰوةً وَّاَقْرَبَ رُحْمًا ﴿٨١﴾

**म्हणून आम्ही इच्छिले की, त्यांना त्यांच्या पालनकर्त्याने त्याच्या ऐवजी, त्याच्यापेक्षा चांगले पवित्र, आणि त्याच्यापेक्षा जास्त प्रेम करणारे मूल द्यावे** (८१)

وَاَمَّا الْجِدَارُ فَكَانَ لِغُلٰمَيْنِ يَتِيْمَيْنِ فِي الْمَدِيْنَةِ وَكَانَ تَحْتَهٗ كَنْزٌ لَّهُمَا وَكَانَ اَبُوْهُمَا صَالِحًا ۚ فَاَرَادَ رَبُّكَ اَنْ يَّبْلُغَآ اَشُدَّهُمَا وَيَسْتَخْرِجَا كَنْزَهُمَا ۖ رَحْمَةً مِّنْ رَّبِّكَ ۚ وَمَا فَعَلْتُهٗ عَنْ اَمْرِيْ ؕ ذٰلِكَ تَاْوِيْلُ مَا لَمْ تَسْطِعْ عَّلَيْهِ صَبْرًا ﴿٨٢﴾ ع ١٢

**आणि भिंतीची गोष्ट अशी आहे की, या शहरात दोन अनाथ मुले आहेत, त्यांचा खजीना, त्यांच्या या भिंतीखाली गडलेला आहे. त्यांचे वडील फार सदाचरणी मनुष्य होते.तर तुझ्या पालनकर्त्याची इच्छा होती की, या दोन्ही अनाथ (मुलांनी) आपल्या तारूण्यात येऊन, आपला हा खजिना, तुझ्या पालनकर्त्याची कृपा आणि दयेने काढून घ्यावा; मी आपल्या मताने आणि अखत्यारीने, कोणी काम केले नाही[७]. ही होती खरी वास्तविकता, या गोष्टींची, ज्यावर आपण दम धरू शकला नाही.** (८२)

१) म्हणजे आतांजर पुन्हा प्रश्न विचारीन तर आपल्या सोबतीपासून मला वंचित करून टाकावे. मी काही आक्षेप घेणार नाही. यासाठी की आपल्याजवळ पुरेशी सबब राहील.

२) कारण की ही कंजुषीची आणि भुक्कडांची वस्ती होती. की पाहुण्यांचा पाहुणचार करण्याला नाकारले. वास्तविक प्रवाशांना जेवण देणे, आणि पाहुणचार करणे, प्रत्येक धर्मशास्त्राचा चारित्र्य विषयक शिक्षणाचा महत्त्वाचा भाग राहिला आहे. नबी ﷺ नी सुद्धा पाहुणचार आणि पाहुण्यांचा आदर करणे यांना ईमानाचा तगादा ठरविला आहे. फर्माविले, ''जो, अल्लाह आणि शेवटच्या दिवसावर ईमान ठेवतो; त्याला पाहिजे की, पाहुण्यांचा आदर सन्मान करावा.'' (स. मुस्लिम)

३) ह.खिजरनी या भिंतीला हात लावला आणि अल्लाहच्या हुकूमाने एक चमत्कार म्हणून ती सरळ होऊन गेली, जसे

की स.बुखारीच्या रिवायतीने स्पष्ट आहे.
४) ह.मूसा عليه السلام जे बस्तीवाल्यांच्या रवैयाने पहिलेच नाराज होते, ह.खिज्रच्या या मजुरी शिवायच्या उपकारावर, गुपचुप राहूंशकले नाहीत; आणि बोलून पडले की, जर या वस्तीवाल्यांनी आमचा प्रवास, आमची गरज, आणि प्रतीष्ठेचा यापैकी, कुठल्याही गोष्टीचा विचार केला नाही. तर हे लोक कोणत्या लायकीचे आहेत की, त्यांच्यावर उपकार केला जावा?
५) ह.खिज्र नी म्हटले की मूसा ! हा तिसरा प्रसंग आहे, की तू दम धरूंशकला नाहीस. आणि आतां, स्वत: तुझ्या म्हणण्याप्रमाणे, मी तुला बरोबर ठेवण्याला अपात्र आहे.
६) परंतु वेगळे होण्यापूर्वी, ह.खिजरने तिन्ही घटनांच्या वास्तविकतेशी त्यांना परिचित आणि माहित करून देणे आवश्यक समजले. कारण की, मूसा عليه السلام नी कोण्या गैर समजाला बळी पडू नये. आणि त्यांनी हे समजून घ्यावे की, पैगंबरीचे ज्ञान काही आणखी आहेत, जे त्यांना देण्यात आले आहे. आणि ह. खिज़र ला दिलेले. ज्ञान ते वेगळे आहेत; जे अल्लाहच्या प्रयोजन आणि मर्जीनुसार, (ज्याचे ज्ञान, अल्लाहशिवाय कोणालाही नाही) ह.खिज्रला देण्यात आले आहे. आणि त्यांनी याच्याच प्रकारे असे काम केले, जे धर्मशास्त्राच्या ज्ञानाच्या अनुषंगाने योग्य (जाएज) नव्हते. आणि याकरितांच ह.मूसा عليه السلام त्यावर खरे पाहता, खामोश राहू शकत नव्हते. याच कामांना पार पाडण्यामुळे, काही ज्ञानवाल्यांचे मत आहे की, ह.खिज्र, मनुष्यांमधून नव्हते. आणि याचमुळे ते त्यांच्या पैगंबर किंवा वली होण्याच्या वादांत पडत नाहीत; कारण की ही सारी पदे तर मनुष्यमात्रासाठीच आहेत. ते म्हणतात की ते देवदूत होते. परंतु जर अल्लाहतआला, आपल्या कोण्या पैगंबराला, काही निर्मितीच्या कामांची सूचना देऊन, त्यांच्या मार्फत ते काम करून घेईन, तर यांत सुद्धा काही, स्थितीत बदल होत नाही. जेव्हा तो, ज्याच्यावर वह्य अवतरीत होते, स्वत: या कामाचा खुलासा करून देईन की, मी हे काम अल्लाहच्या हुकमानेच केले आहे; तर जरी जाहीररित्या, ती कामे धर्मशास्त्राच्या विरूद्धच दिसत असली, परंतु जेव्हा त्यांचा संबंधच निर्मितीच्या कामाशी (तकविनी उमुर) आहे. तर तेथे, योग्य आहे कांअयोग्य आहे हा वादच, अनावश्यक आहे. जसे तकवीनी आदेशांअंतर्गत कोणी आजारी पडतो, कोणी मरतो, कोणाचा कारभार बर्बाद होऊन जातो, समाजांवर अल्लाहची शिक्षा येते. यांच्यातून काही कामे, काही वेळा, अल्लाहच्या हुकुमाने देवदुतच करीत असतात. तर ज्याप्रमाणे ही कामे आजपर्यंत कोणाला धर्मशास्त्राच्या विरुद्ध दिसली नाही अशाच प्रकारे ह.खिज्रच्या मार्फत, घडून येणाऱ्या घटनांचा संबंधपण, कारण की, तकवीनी कामांशी आहे, त्यांना धर्मशास्त्राच्या तराजूत तोलणेच चुकीचे आहे. तथापि, आता वह्य आणि पैगंबरीचा क्रम, संपवून गेल्यानंतर, कोण्या माणसाचा अशा प्रकारचा दावा, कधीच बरोबर आणि मान्य करण्यासारखा असणार नाही. जसे की ह.खिज्र कडून सांगण्यांत आले आहे. कारण ह.खिज्रचा मामला तर, कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याने (नस्से कुरआनी) सिद्ध आहे. म्हणून त्याला कोणी नाकारण्याची हिंमत करणार नाही. परंतु आता, जो पण या प्रकारचा दावा, किंवा कर्म करेल, त्याला नाकारणे, आवश्यक आणि जरूरी आहे. कारण की आता ते निश्चित ज्ञानाचे साधन अस्तित्वांत नाही, ज्यामुळे त्याच्या दाव्याची आणि कर्माची, वास्तविकता स्पष्ट होऊ शकेल.
७) ह.खिज्रच्या पैगंबरीला मानणाऱ्यांची ही दुसरी दलील आहे; जिच्याने ते ह.खिज्र हे पैगंबर होते असे सिद्ध करतात. कारण की कोण्याही, जो पैगंबर नाही, त्याच्याजवळ, अशाप्रकारचे वह्य येत नसते, की तो इतकी इतकी महत्त्वाची कामे, कोण्या अदृष्य इशाऱ्यावर करून देईन. न कोण्या पैगंबर व्यतिरिक्त माणसाचा, असा अदृष्य इशारा, कर्म करण्यायोग्यच आहे. ह. खिजरच्या पैगंबर असण्याप्रमाणेच, ह. खिज्रचे जीवन सुद्धां, एका वर्गांत, वेगवेगळ्या चर्चेला कारण आहे. आणि जे ह. खिज्र जिवंत आहेत, असे मानणारे आहेत, ते पुष्कळशा लोकांच्या भेटी ह.खिज्रशी झाल्यांत, असे सिद्ध करतात. आणि मग त्यांच्याकडून ते जिवंत असल्याचा आधार धरतात. परंतु ज्याप्रमाणे ह.खिज्रच्या जिवंत असण्यावर कोणी धर्मशास्त्रीय स्पष्ट प्रमाण नाही, त्याचप्रमाणे लोकांचे त्यांना प्रकट होऊन दिसणे किंवा जागृतावस्थेत किंवा निद्रावस्थेत, ह.खिज्रला भेटण्याचे दावे पण मान्य होण्यासारखे नाहीत. जेव्हांकी त्यांची चेहरेपट्टीच सनदशीर मार्गाने नक्कल केली गेलेली नाही; तर त्यांचे ओळखणे पण कसे शक्य आहे ? आणि का म्हणून विश्वास केला जाऊ शकतो? की ज्या बुजुर्गांनी भेटण्याचे दावे केले आहेत, खरोखर त्यांची भेट ह. खिज्र बरोबरच झाली आहे? ह. खिज्रच्या नांवावर त्यांनी कोणी धोका किंवा फसवणुकीत तर व्यस्त केले नाही?

وَيَسْـَٔلُوْنَكَ عَنْ ذِي الْقَرْنَيْنِ ۭ قُلْ سَاَتْلُوْا عَلَيْكُمْ مِّنْهُ ذِكْرًا ۝٨٣

आणि हे लोक, आपल्याकडे जुलकर्नैन ची गोष्ट विचारीत[१] आहेत. आपण सांगून द्या की, मी त्याची थोडीशी माहिती, तुम्हास वांचून ऐकवित आहे. (८३)

اِنَّا مَكَّنَّا لَهٗ فِي الْاَرْضِ وَاٰتَيْنٰهُ مِنْ كُلِّ شَيْءٍ سَبَبًا ۝٨٤

आम्ही त्याला पृथ्वीत सामर्थ्य दिले होते; आणि त्याला प्रत्येक प्रकारचा साज सरंजाम[२] पण दिला होता. (८४)

فَاَتْبَعَ سَبَبًا ۝٨٥

तो एका मार्गाला लागला[३] (८५)

حَتّٰٓي اِذَا بَلَغَ مَغْرِبَ الشَّمْسِ وَجَدَهَا تَغْرُبُ فِيْ عَيْنٍ حَمِئَةٍ وَّوَجَدَ عِنْدَهَا قَوْمًا ڛ قُلْنَا يٰذَا الْقَرْنَيْنِ اِمَّآ اَنْ تُعَذِّبَ وَاِمَّآ اَنْ تَتَّخِذَ فِيْهِمْ حُسْنًا ۝٨٦

येथपावेतो की सूर्य अस्तास जाण्याच्या जागेवर पोहचून गेला. आणि त्याला एका दलदलीच्या पाणथळ जागेत अस्त होतांना पाहिले[४]; आणि या पाण्याच्या ठिकाणी एका समाजाला पण पाहिले; आम्ही सांगून दिले[५] की, हे जुल्कर्नैन! तू एक तर त्यांना त्रास द्यावा, किंवा त्यांच्याशी चांगली वागणुक अंगिकारावी[६] (८६)

قَالَ اَمَّا مَنْ ظَلَمَ فَسَوْفَ نُعَذِّبُهٗ ثُمَّ يُرَدُّ اِلٰى رَبِّهٖ فَيُعَذِّبُهٗ عَذَابًا نُّكْرًا ۝٨٧

त्याने म्हटले की, जो जुलूम करेल, त्याला तर आम्ही सुद्धा, आता शिक्षा देऊ[७]. मग जेव्हा आपल्या पालनकर्त्याकडे परतविला जाईल; आणि तो त्याला कठीण अशी शिक्षा देईन (८७)

وَاَمَّا مَنْ اٰمَنَ وَعَمِلَ صَالِحًا فَلَهٗ جَزَاۗءَ ۨ الْحُسْنٰى ۚ وَسَنَقُوْلُ لَهٗ مِنْ اَمْرِنَا يُسْرًا ۝٨٨

आणि होय! पण जो ईमान आणील, आणि चांगली कामे करीन, त्याच्यासाठी तर बदल्यात भलाई आहे; आणि आम्ही त्याला आपल्या कामातसुद्धा सोपे तेच सांगू (८८)

ثُمَّ اَتْبَعَ سَبَبًا ۝٨٩

मग तो एका दुसऱ्या मार्गाला लागला[८]; (८९)

حَتّٰٓي اِذَا بَلَغَ مَطْلِعَ الشَّمْسِ وَجَدَهَا تَطْلُعُ عَلٰي قَوْمٍ لَّمْ نَجْعَلْ لَّهُمْ مِّنْ دُوْنِهَا سِتْرًا ۝٩٠

येथपर्यंत की, जेव्हा सूर्य उदय होण्याच्या जागेपर्यंत पोहचला, त्याला एका अशा लोकांवर उगतांना पाहिले की, त्यांच्यासाठी आम्ही, त्याच्याकडून आणखी पडदा आणि आड बनविली नाही.[९] (९०)

كَذٰلِكَ ۭ وَقَدْ اَحَطْنَا بِمَا لَدَيْهِ خُبْرًا ۝٩١

गोष्ट अशीच आहे; आम्ही त्याच्या आसपासच्या माहितीला घेरून ठेवले आहे.[१०] (९१)

ثُمَّ اَتْبَعَ سَبَبًا ۝٩٢

मग तो पुन्हा एका प्रवासाच्या तयारीला[११] लागला; (९२)

حَتّٰٓي اِذَا بَلَغَ بَيْنَ السَّدَّيْنِ وَجَدَ مِنْ دُوْنِهِمَا قَوْمًا ۙ لَّا يَكَادُوْنَ يَفْقَهُوْنَ قَوْلًا ۝٩٣

येथ पावेतो की, जेव्हा,दोन भिंतीच्या[१२] दर्म्यान पोहचला; या दोन्हीच्या इकडे त्याला असे लोक आढळून आले जे काही गोष्ट समजण्याच्या पलीकडे होते[१३] (९३)

قَالُوْا يٰذَا الْقَرْنَيْنِ اِنَّ يَاْجُوْجَ وَمَاْجُوْجَ مُفْسِدُوْنَ فِي الْاَرْضِ فَهَلْ نَجْعَلُ لَكَ خَرْجًا عَلٰٓي اَنْ تَجْعَلَ بَيْنَنَا وَبَيْنَهُمْ سَدًّا ۝٩٤

ते म्हणाले की हे जुल्कर्नैना[१४]! याजूज (आणि) माजूज, या देशात (मोठ) फिसाद करणारे आहेत[१५]. तर काय आम्ही तुझ्यासाठी, काही भांडवल जमा करून द्यावे? (या अटीवर की) तुम्ही त्याच्या आणि आमच्या दर्म्यान, कोणी भिंत बांधून द्यावी (९४)

१) हे मुशरिकीनच्या त्या तिसऱ्या प्रश्नाचे उत्तर आहे, जे यहूद्यांच्या सांगण्यावर, त्यांनी नबी ﷺ ला, केले होते. जुल्कर्नैनचा शाब्दिक अर्थ 'दोन शिंगावाला' असा आहे. हे नांव यासाठी पडले की, खरोखर त्याच्या डोक्यावर दोन शिंगे होती; किंवा यासाठी की त्याने, पूर्व आणि पश्चिम, जगाच्या दोन्ही किनाऱ्यांवर पोहचूंन, सूर्याच्या किरणांना पाहिले. काही म्हणतात की, त्याच्या डोक्यावर केसांच्या दोन बटा होत्या, 'करन', केसांच्या बटांना पण म्हणतात. म्हणजे दोन बटा किंवा दोन वेण्या, किंवा दोन केसांच्या जुल्फांनवाला. जुन्या भाष्यकारांनी सर्वसाधारण याला सिकंदर रूमी ठरविले आहे. ज्याच्या विजयाचे वर्तूळ, पूर्व आणि पश्चिमेपर्यंत, पसरलेले होते. परंतु नवीन भाष्यकार, नवीन ऐतिहासिक माहितीच्या प्रकाशांत, याच्याशी सहमत नाही. विशेषत: मौलाना अबुल कलाम आझाद (रह.) नी याच्यावर जी दाद देण्यासारखी छानबीन केली आहे, आणि त्याव्यक्तीच्या ओळखण्यामध्ये, जी मेहनत आणि प्रयत्नांची पराकाष्टा केली आहे. ती निश्चितच कदर करण्यासारखी आहे. त्यांच्या छानबीनचा खुलासा हा आहे की,

या जुल्कर्नैनच्या बाबतीत, कुरआनाने खुलासा केला आहे की, १) तो असा सत्ताधीश होता, ज्याला अल्लाहतआलाने साज व सरंजामाच्या विपुलतेने, मालामाल केले होते (२) तो पूर्वीय आणि पाश्चीमात्य देशांना, पादाक्रांत करीत, एका अशा पर्वतीय खिंडीत पोहचला, जिच्या दुसऱ्या बाजुला याजूज आणि माजूज होते (३) त्याने तेथे, याजूज माजूजचा रस्ता बंद करण्यासाठी, एक फारच भक्कम बांध बांधला (४,५) तो न्यायप्रिय, अल्लाहला मानणारा, आणि शेवटच्या दिवसावर ईमान ठेवणारा होता (६) तो विलासी आणि धन दौलतीचा लालची नव्हता. मौलाना मर्हुम म्हणतात, की या वैशिष्ट्यांनी भारित फक्त, पारसचा तो सत्ताधीश आहे, जो युनानी सायरस, इब्रानी खोरस, आणि अरब कैखुसरु च्या नांवाने ओळखला जातो. त्याचा सत्तेचा काळ सन ५३९ ईसापूर्वी, आहे. तसेच असे म्हणतात की, सन इसवी १८३८ मध्ये सायरसच्या एका पुतळ्याचा पण शोध लागला, ज्यांत सायरसचे शरीर अशाप्रकारे दाखविण्यांत आले आहे की त्याच्या दोन्ही बाजुला, ससाण्याप्रमाणे, पंख निघालेले आहेत. आणि डोक्यावर एडक्यासारखे दोन शिंगे आहेत. (तपशीलासाठी कृपया पहावे भाष्य, ''तर्जमानुल कुरआन'' जि.१ पृ.३११-४३०, जुनी आवृत्ती)

२) 'सबब' चा खरा अर्थ दोरीचा आहे. या शब्दाचा उपयोग असा साधन सामुग्री वर केला जातो, जो उद्देश्य साध्य करण्यासाठी वापरण्यांत येतो. या अनुषंगाने 'सबबा' चा अर्थ आहे, आम्ही त्याला असा साज व सामान, आणि साहित्य, उपलब्ध करून दिले, ज्यांचा उपयोग करून त्याने विजय संपादन केलेत. शत्रुंचा गर्व मातीत मिळवून दिला. आणि जालीम सत्ताधिशांना नेस्तनाबुद करून टाकले. (होत्याचे न होते करून टाकले.)

३) दुसरा सबबचा अर्थ, रस्त्याचा केला गेला आहे; किंवा हा अर्थ आहे की, अल्लाहच्या दिलेल्या साहित्यापासून सामान व साहित्य तयार करून मिळविले. ज्याप्रमाणे अल्लाहच्या निर्माण केलेल्या लोखंडापासून, निरनिराळ्या प्रकारची शस्त्रे, आणि अशाचप्रकारे दुसऱ्या कच्च्यासामुग्री पासून, पुष्कळसे साहित्य तयार केले जाते.

४) ''ऐन'' ने अभिप्रेत, झरा किंवा समुद्र आहे. 'हमिअतिन' चिखल किंवा दलदल 'वजदा' (पावला) म्हणजे पाहिला. किंवा त्याला जाणवला. अर्थ हा आहे की, जुल्कर्नैन जेव्हा पश्चिम दिशेला, देशा देशांवर जिंकत, या ठिकाणावर पोहचून गेला; जेथे शेवटची वस्ती होती. तेथे गढूळ पाण्याचा झरा किंवा समुद्र होता, जो खालून काळा वाटत होता. त्याला असे जाणवले की, जणू सूर्य या झऱ्यात, बुडत आहे. समुद्राच्या किनाऱ्यावरून, किंवा दुरून, ज्याच्यापुढे दृष्टीसमोर काहीही नसेल, सूर्यास्ताचे दृष्य, पाहणाऱ्यांना, असेच वाटते की, सूर्य समुद्रांत किंवा जमिनीत बुडत आहे; वास्तविक तो आपल्या ठिकाणी, आकाशांतच असतो.

५) 'कुलना' आम्ही म्हटले, वह्यच्या मार्फत; यामुळेच काही धर्मपंडीतांनी, त्यांच्या पैगंबरीवर आधार घेतला आहे. आणि जे त्यांच्या पैगंबरीला मान्य करीत नाहीत, ते म्हणतात की, त्यावेळेच्या पैगंबरामार्फत, आम्ही त्यास सांगितले.

६) म्हणजे आम्ही त्या लोकांवर वर्चस्व देऊन, त्याला अखत्यार दिला की, तू इच्छील तर ठार कर, किंवा कैदी बनवून घे, किंवा प्राणमूल्य घेऊन, किंवा उपकार म्हणून, सोडून दे.

७) म्हणजे जो कुफ्र शिर्कवर जमून राहील, त्याला आम्ही शिक्षा देऊं. म्हणजे मागच्या चुकांवर त्यांची पकड करणार नाही.

८) म्हणजे आता पूर्वेकडून पश्चिमेकडे प्रवास सुरू केला.

९) म्हणजे अशा ठिकाणी पोहचला, जी पूर्वेकडची शेवटची वस्ती होती. इलाच सूर्योदयाची जागा म्हटले गेले आहे. जेथे त्याने असे लोक पाहिले, जे घरांत रहाण्याऐवजी, मैदानांत, किंवा जंगलात वस्ती केलेले, वस्त्रांपासून मुक्त होते. हा अर्थ आहे, त्यांच्या आणि सूर्याच्या दर्म्यान काही आड, पर्दा नव्हतां. सूर्य त्यांच्या उघड्यांअंगावर उगवत असे.

१०) म्हणजे जुलकर्नैनच्या बाबतीत आम्ही जे सांगितले आहे, ते अशाचप्रकारे आहे की, पहिले तो पश्चिमेच्या शेवटाला, आणि मग पूर्वेच्या शेवटाला पोहचला; आणि आम्हास त्याचे सर्व कौशल्य, सामान आणि शस्त्रात्रे, आणि दुसऱ्या तमाम गोष्टींचे पूर्ण ज्ञान होते.

११) म्हणजे आता त्याचे वळण कोण्या दुसरीकडे होऊन गेले.

१२) याच्याने अभिप्रेत दोन पर्वत आहेत. जे एक दुसऱ्या समोर होते. यांच्या दर्म्यान खाई होती. जिच्यातून याजूज व माजूज, इकडे वस्तीत येऊन पोहचत; आणि धूम करीत आणि मारा माऱ्या आणि खुन करीत.

१३) म्हणजे त्यांना आपल्या भाषेशिवाय, दुसऱ्या कोणाची भाषा समजत नव्हती.

१४) जुल्कर्नैनशी हे बोलणे, एक तर कोण्या दुभाषा मार्फत झाले असेल, किंवा अल्लाहतआलाने, जुल्कर्नैनला जे विशिष्ट साधने आणि साहित्य देऊन ठेवली होती; त्यांच्यांत वेगवेगळ्या भाषांचे ज्ञान पण असू शकते. आणि अशाप्रकारे, ही बोलणी, सरळ सरळ पण होऊ शकत होती.

१५) याजूज माजूज हे दोन समाज आहेत आणि सहीही हदीसींप्रमाणे, मानवी वंशातूनच आहेत. आणि त्यांची संख्या, दुसऱ्या मानवी वंशाच्या तुलनेत, जास्त असेल, आणि त्यांच्यानेच जहन्नम जास्त भरेल. (स.बुखारी व स.मुस्लीम)

قَالَ مَا مَكَّنِّي فِيهِ رَبِّي خَيْرٌ فَأَعِينُونِي بِقُوَّةٍ أَجْعَلْ بَيْنَكُمْ وَبَيْنَهُمْ رَدْمًا ﴿٩٥﴾

**त्याने उत्तर दिले की, माझ्या अखत्यारीत, माझ्या पालनकर्त्याने, जे देऊन ठेवले आहे, तेच उत्तम आहे. तुम्ही फक्त आपल्या शक्ती सामर्थ्याने[१] माझी मदत करा. ९५**

آتُونِي زُبَرَ الْحَدِيدِ ۖ حَتَّىٰ إِذَا سَاوَىٰ بَيْنَ الصَّدَفَيْنِ قَالَ انفُخُوا ۖ حَتَّىٰ إِذَا جَعَلَهُ نَارًا قَالَ آتُونِي أُفْرِغْ عَلَيْهِ قِطْرًا ﴿٩٦﴾

**मी तुमच्यांत आणि त्यांच्यात मजबूत आडपरदा बनवून देतो. मला लोखंडाच्या कांबी आणून द्या; येथ पावेतो की जेव्हा त्या दोन्ही पर्वतांच्या दर्म्यान ही भिंत बरोबर करून दिली[२]; मग हुकूम दिला की, आग प्रज्वलित करा. मग त्या लोखंडांच्या कांबींना एकदम लाल भडक करून टाकले. मग सांगितले की, माझ्याजवळ वितुळलेले तांबे आणून द्या; की मी याच्यावर ते ओतून टाकेन[३] ९६**

فَمَا اسْطَاعُوا أَن يَظْهَرُوهُ وَمَا اسْتَطَاعُوا لَهُ نَقْبًا ﴿٩٧﴾

**तर मग आता, न त्यांच्यात त्या भिंतीवर चढण्याची ताकद आहे; न तिच्यात कोणी भोक पाडूंशकतात ९७**

قَالَ هَٰذَا رَحْمَةٌ مِّن رَّبِّي ۖ فَإِذَا جَاءَ وَعْدُ رَبِّي جَعَلَهُ دَكَّاءَ ۖ وَكَانَ وَعْدُ رَبِّي حَقًّا ﴿٩٨﴾

**(त्याने) म्हटले की, ही फक्त माझ्या पालनकर्त्याची मेहरबानी आहे. होय! परंतु जेव्हा माझ्या पालनकर्त्याचा वायदा येऊन ठेपेल, तर इला तो जमीनदोस्त करून टाकेन[४]; नि:संशय माझ्या पालनकर्त्याचा वायदा खरा आणि सत्य आहे. ९८**

१) कुवतने अभिप्रेत तुम्ही मला बांधकामाचे सामान, आणि मनुष्यबळ मिळवून द्या.

२) 'बैनस् सद्फैन' म्हणजे दोन्ही पर्वता दर्म्यान, जी मोकळी जागा होती, तिला लोखंडाच्या लहान लहान चादरीने भरून टाकले.

३) 'कित्रन' म्हणजे पिघळलेले शिसे, किंवा लोखंड किंवा तांबे, म्हणजे लोखंडाच्या चादरींना खूप गरम करून, त्यांच्यावर पिघळलेले लोखंड किंवा शिसे किंवा तांबे, टाकल्याने ती पर्वतीय खिंड किंवा रस्ता असा मजबूत (बंद) होऊन गेला की त्याला ओलांडून, किंवा तोडून, याजूज व माजूजने इकडे दुसऱ्या मनुष्य वस्तीत येणे, अशक्य होऊन गेले.

४) म्हणजे ही भिंत जरी मजबूत बनवून दिली गेली, जिच्यावर चढून, किंवा तिच्यांत भोक पाडून, याजूज माजूजचे इकडे येणे शक्य नाही; परंतु जेव्हा माझ्या पालनकर्त्याचा वायदा येऊन जाईल, तर तो तिला कण कण करून, जमिनीच्या बरोबर करून टाकेन. या वायद्याने अभिप्रेत, कयामतच्या जवळ, याजूज आणि माजूजचे जाहीर होणे आहे; जसे की हदीशींमध्ये आहे. उदाहरणार्थ एका हदीसीमध्ये, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी, या भिंतीत थोडी भोके पाडण्याला, फितना होण्याला जवळ, असे म्हटले आहे. (स.बुखारी क्र.३३४६, व मुस्लिम क्र.२२०८) एका आणखी हदीशीमध्ये येते की ते दररोज या भिंतीला खोदतात, आणि मग पुन्हा उद्यांसाठी सोडून देतात. परंतु जेव्हा अल्लाहची मर्जी त्यांना बाहेर काढण्याची होईल, तर मग तेव्हा ते म्हणतील, इन्शा अल्लाह् उद्या हिला खोदू. आणि मग दुसऱ्या दिवशी ते, तिच्यांतून निघण्यांत यशस्वी होऊन जातील. पृथ्वीत फसाद फैलावतील येथपावेतो की, लोक किल्ल्यांत बंद होऊन जातील. हे आकाशांवर बाण फेकतील, जे रक्तरंजीत होऊन परत येतील. सरशेवटी अल्लाहतआला त्यांच्या डोक्याच्या मागच्या भागांत असा किडा निर्माण करून टाकेन, ज्यामुळे ते मरून जातील. (मुसनद अहमद ५११/१२, जामए तिर्मिझी क्र.३१५३) स.मुस्लिममध्ये, नव्वास बिन सम्आन (रजी.) च्या रिवायत मध्ये खुलासा आहे, की, याजूज माजूजचे जाहीर होणे, ह.ईसा عليه السلام च्या अवतरणानंतर, त्यांच्या उपस्थितीत होईल. (किताबुल फतन, व अशरातुल साअत, बाब जिकरूल दज्जाल) ज्यामुळे त्या लोकांचे खंडन होऊन जाते, जे म्हणतात की, तातार लोकांचा मुसलमानांवर हल्ला, किंवा मंगोल तुर्क, ज्यांच्यातून चंगेझपण होता; किंवा रशीयन किंवा चिनीलोक, हेच याजूज माजूज आहेत. जे जाहीर होऊन चुकले; किंवा पाश्चिमात्य लोक, हेच याला (म्हणजे याजूज माजूज होण्याला) पात्र ठरतात, की, संपूर्ण जगात त्यांचे प्राबल्य आणि वर्चस्व आहे. या सर्व गोष्टी चूक आहेत. कारण की, यांच्या वर्चस्वाने, राजकीय वर्चस्व, अभिप्रेत नाही. किंबहुना खून आणि मारामाऱ्या आणि खोडसळपणा आणि फसादाचे तात्कालीक प्राबल्य आहे. ज्याचा मुकाबला करण्याची ताकद, मुसलमानांत असणार नाही. संसर्गजन्य आजाराने, सर्वच्या सर्व क्षणार्धांत, मृत्युचा घांस होऊन जातील.

وَتَرَكْنَا بَعْضَهُمْ يَوْمَئِذٍ يَمُوجُ فِي بَعْضٍ وَنُفِخَ فِي الصُّورِ فَجَمَعْنَاهُمْ جَمْعًا ﴿٩٩﴾

**आणि त्या दिवशी आम्ही त्यांना आपसांत एक दुसऱ्यावर धसत, येतांना सोडून देऊ. आणि सूर फुंकून दिला जाईल; मग सर्वांना एकत्र करून, आम्ही जमा करून घेऊ (९९)**

وَعَرَضْنَا جَهَنَّمَ يَوْمَئِذٍ لِلْكَافِرِينَ عَرْضًا ﴿١٠٠﴾

**आणि त्यादिवशी आम्ही नरकाग्नीला (सुद्धा,) काफिरांच्या समोर आणून उभे करून देऊ (१००)**

الَّذِينَ كَانَتْ أَعْيُنُهُمْ فِي غِطَاءٍ عَنْ ذِكْرِي وَكَانُوا لَا يَسْتَطِيعُونَ سَمْعًا ﴿١٠١﴾

**ज्यांचे डोळे, माझ्या स्मरणाकडून पडद्यांत होते. आणि (सत्य आदेश) ऐकूपण शकत नव्हते. (१०१)**

أَفَحَسِبَ الَّذِينَ كَفَرُوا أَنْ يَتَّخِذُوا عِبَادِي مِنْ دُونِي أَوْلِيَاءَ ۚ إِنَّا أَعْتَدْنَا جَهَنَّمَ لِلْكَافِرِينَ نُزُلًا ﴿١٠٢﴾

**काय काफिर हा विचार करून बसले आहेत? की माझ्या शिवाय माझ्या दासांना आपला पुरस्कर्ता बनवून घ्यावे? (ऐका)! आम्ही तर त्या काफिरांच्या पाहुणचारासाठी जहन्नमला तयार करून ठेवले आहे[1]. (१०२)**

قُلْ هَلْ نُنَبِّئُكُمْ بِالْأَخْسَرِينَ أَعْمَالًا ﴿١٠٣﴾

**सांगून टाका की (जर तुम्ही) म्हणाल तर मी तुम्हाला दाखवू, की कर्मांच्या दृष्टीने, सगळ्यांत जास्त घाट्यांत कोण आहेत? (१०३)**

الَّذِينَ ضَلَّ سَعْيُهُمْ فِي الْحَيَاةِ الدُّنْيَا وَهُمْ يَحْسَبُونَ أَنَّهُمْ يُحْسِنُونَ صُنْعًا ﴿١٠٤﴾

**ते आहेत, ज्यांच्या ऐहिक जीवनाचे सर्व प्रयत्न निष्फळ होऊन गेलेत. आणि ते अशाच भ्रमांत राहिले की ते फार चांगले कामे करीत आहेत[2] (१०४)**

أُولَٰئِكَ الَّذِينَ كَفَرُوا بِآيَاتِ رَبِّهِمْ وَلِقَائِهِ فَحَبِطَتْ أَعْمَالُهُمْ فَلَا نُقِيمُ لَهُمْ يَوْمَ الْقِيَامَةِ وَزْنًا ﴿١٠٥﴾

**हेच ते लोक आहेत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या निशाण्यांना आणि भेटीला नाकारले[3]. मग त्यांची सर्व कर्मे अक्रित होऊन गेलीत. मग आम्ही कयामतच्या दिवशी त्यांची कुठलीही (कर्मे) वजनांत कायम करणार नाही[4] (१०५)**

१) 'हसिबा' भ्रमाच्या अर्थांत आहे. आणि 'इबादी' (माझे सेवक) ने अभिप्रेत, देवदूत, ईसा عليه السلام आणि दुसरे पुण्यवान लोक आहेत. ज्यांना इच्छापूर्ती करणारे, आणि संकट निवारक समजले जाते. अशाचप्रकारे, शैतान आणि जिन्नात आहे. ज्यांची उपासना केली जाते. आणि विचारणे, कान उघाडणीसाठी आहे. म्हणजे अल्लाहला सोडून, इतरांचे हे पुजारी, काय हे समजात की, ते मला सोडून, आणि माझ्या सेवकांची उपासना करून, त्यांच्या पुरस्काराने, माझ्या शिक्षेपासून वाचून जातील? हे अशक्य आहे. आम्ही तर या काफिरांकरीता जहन्नम तयार करून ठेवली आहे. ज्यांत जाण्यापासून, त्यांना हे सेवक रोकूं शकणार नाही. ज्यांची हे उपासना करतात, आणि त्यांना आपला हिमायती समजतात.

२) म्हणजे, त्यांची कर्मे अशी आहेत, जी अल्लाहला पसंत नाहीत. परंतु हे समजतात की हे फारच चांगली कामे करीत आहेत. याच्याने अभिप्रेत कोण आहेत? काही म्हणतात की, यहूदी आणि खिस्ती आहेत. काही म्हणता की, शिया आणि दुसरे बिदअती आहेत. काही म्हणतात की मुशरिकीन आहेत. खरी गोष्ट अशी आहे की, हे महावाक्य सर्वसाधारण आहे. त्याच्यात प्रत्येक ती व्यक्ती, आणि गट शामिल आहे, ज्याच्यामध्ये, चर्चित वैशिष्टये असतील. पुढे अशाच लोकांच्या बाबतीत धमक्या देण्यात आल्या आहेत.

३) पालनकर्त्याच्या निशाण्यांनी अभिप्रेत तौहिदची (एकेश्वरवादाची) ती प्रमाणे आहेत, जे या विश्वांत पसरलेले आहेत. आणि त्या स्पष्ट निशाण्या आहेत; ज्या त्याने आपल्या पुस्तकांमध्ये अवतरीत केल्या; आणि पैगंबरांनी त्यांचा प्रचार आणि स्पष्टीकरण केले. आणि पालनकर्त्याच्या भेटीच्या कुफ्रने अर्थ, पारलौकीक जीवन, आणि दुसऱ्यांदा जीवंत होऊन उठण्याला नाकारणे आहे.

४) म्हणजे आमच्या येथे त्यांची काहीच कदर आणि किंमत होणार नाही. किंवा हा अर्थ आहे की, आम्ही त्यांच्यसाठी तराजुचा बंदोबस्त करणार नाही, ज्यांत त्यांची कर्मे मोजली जावीत; यासाठी की कर्मे तर त्या एकेश्वरवाद्यांची तोलली जातील, ज्याच्या कर्मपात्रांत, पुण्य आणि पाप, दोन्ही असतील; जेव्हांकी यांची कर्मेपत्रे, पुण्यापासून एकदम रिक्त असतील, ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते की, ''कयामतच्या दिवशी मोठा गलेलठ्ठ माणूस येईल, अल्लाहच्याजवळ त्याचे इतके वजन होणार नाही, जेवढे मच्छराच्या पंखाचे असते. मग आपण (सल्ल.) नी याच महावाक्याची तिलावत केली. (सहीह बुखारी, सू.कहफ)

ذٰلِكَ جَزَآؤُهُمْ جَهَنَّمُ بِمَا كَفَرُوْا وَاتَّخَذُوْٓا اٰيٰتِيْ
وَرُسُلِيْ هُزُوًا ﴿١٠٦﴾

**परिस्थिती अशी आहे की त्यांचा बदला जहन्नम आहे; कारण की त्यांनी कुफ्र केले आणि माझ्या निशाण्या आणि माझ्या पैगंबरांना थट्टामस्करीत उडवून लाविले. (१०६)**

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ كَانَتْ لَهُمْ جَنّٰتُ
الْفِرْدَوْسِ نُزُلًا ﴿١٠٧﴾

**नि:संशय ज्या लोकांनी ईमान आणले आणि त्यांनी कामे पण चांगली केलीत; खचित्च त्यांच्यासाठी जन्नतुल फिरदौसच्या[१] बागांचा पाहुणचार आहे. (१०७)**

خٰلِدِيْنَ فِيْهَا لَا يَبْغُوْنَ عَنْهَا حِوَلًا ﴿١٠٨﴾

**जेथे ते नेहमी राहतील, त्या जागेला बदलण्याचा कधीपण त्यांचा इरादा[२] होणार नाही. (१०८)**

قُلْ لَّوْ كَانَ الْبَحْرُ مِدَادًا لِّكَلِمٰتِ رَبِّيْ لَنَفِدَ الْبَحْرُ
قَبْلَ اَنْ تَنْفَدَ كَلِمٰتُ رَبِّيْ وَلَوْ جِئْنَا بِمِثْلِهٖ مَدَدًا ﴿١٠٩﴾

**आपण सांगून द्या की, जर माझ्या पालनकर्त्याच्या गोष्टी[३] लिहीण्यासाठी, समुद्र शाई होऊन जाईल, तरी सुद्धा माझ्या पालनकर्त्याच्या गोष्टी संपण्यापूर्वीच संपून जाईल; जरी आम्ही याच्याच सारखा, त्याच्या मदतीसाठी आणखीही घेऊन येऊ (१०९)**

قُلْ اِنَّمَآ اَنَا بَشَرٌ مِّثْلُكُمْ يُوْحٰٓى اِلَيَّ اَنَّمَآ اِلٰهُكُمْ
اِلٰهٌ وَّاحِدٌ ۚ فَمَنْ كَانَ يَرْجُوْا لِقَآءَ رَبِّهٖ فَلْيَعْمَلْ عَمَلًا
صَالِحًا وَّلَا يُشْرِكْ بِعِبَادَةِ رَبِّهٖٓ اَحَدًا ﴿١١٠﴾

**आपण सांगून टाका की, मी तर तुमच्या सारखाच एक मनुष्य आहे[४]. (होय!) माझ्याकडे वह्य केले जाते की, सर्वांचा उपास्य फक्त एकच उपास्य आहे[५]; तर ज्याला पण आपल्या पालनकर्त्याला भेटण्याची इच्छा असेल, त्याला पाहिजे की, चांगली कर्मे करावीत; आणि आपल्या पालनकर्त्याच्या उपासनेत[६] कोणाला पण सरकतदार करू नये. (११०)**

१) 'जन्नतुल फिरदौस' स्वर्गाचा सगळ्यात उच्च दर्जा आहे. म्हणून नबी ﷺ नी फर्माविले की, ''जेव्हा ही तुम्ही अल्लाहजवळ स्वर्गाची मागणी कराल, तर जन्नतुल फिरदौसची मागणी करा; यासाठी की तो स्वर्गाचा सर्वांत उच्च आणि मधोमध भाग आहे, आणि तेथून स्वर्गाच्या नद्या उगम पावतात'' (स.बुखारी)

२) म्हणजे स्वर्गवाले, स्वर्ग आणि त्याच्या देणग्यांनी, कधीही कंटाळणार नाहीत. की, त्यांनी याच्याशिवाय कोण्या आणखी ठिकाणी, बदलून जाण्याची इच्छा व्यक्त करावी.

३) 'कलमात' ने अभिप्रेत, अल्लाहचे सर्व व्यापक ज्ञान आहे. त्याचे प्रयोजन, आणि ती प्रमाणे आणि पुरावे आहेत, जे त्याच्या एक होण्याला साक्ष आहे. मानवाची बुद्धी या सर्वांना व्यापूंशकत नाही. आणि जगांतील सर्व वृक्षांच्या लेखण्या होऊन जातील, आणि सर्व समुद्र ,किंबहुना, त्याच्यासारखे आणखी पण समुद्र असतील, ते सर्व शाईत बदलून जातील, लेखण्या घासून जातील आणि शाई संपून जाईल; परंतु पालनकर्त्याचे शब्द, आणि त्याची प्रयोजने, लेखनबद्ध होऊ शकणार नाहीत.

४) म्हणून मी सुद्धा, पालनकर्त्याच्या गोष्टींना घेरू शकत नाही.

५) तथापि मला हे वेगळेपण प्राप्त आहे की, मजवर अल्लाहचे वह्य येते. याच वह्यामुळे, मी अस्हाबे कहफ आणि जुलकर्नैनच्या संबंधात, अल्लाहकडून अवतरीत केलेल्या त्या गोष्टी, सांगितल्या आहेत; ज्यांच्यावर, चालल्या गेलेल्या दिवसांची, दाट थर पडलेले होते; किंवा त्यांची वास्तविकता गोष्टींमध्ये लुप्त झाली होती. याशिवाय या वह्यांमध्ये, सर्वांत महत्त्वाचा हुकूम, हा दिला गेला आहे की, तुम्हा सर्वांचा उपास्य, फक्त एक आहे.

६) चांगली कामे ती आहेत, जी सुन्नतप्रमाणे असतील, म्हणजे जो आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा विश्वास बाळगतो, त्याला पाहिजे की, प्रत्येक कर्म, नबी सल्ल.च्या सुन्नतप्रमाणे करावे. दुसरे असे की, अल्लाहच्या उपासनेत कोणाला शरीक करू नये. कारण की, बिदअ्त आणि शिर्क दोन्ही ही, कर्म अक्रित होण्याला, कारणीभूत आहेत. अल्लाहतआला या दोहोंपासून प्रत्येक मुसलमानांचे संरक्षण करो! आमीन

महावाक्ये ९८ | **(१९) सू.मर्यम** | रुकूअ ६

ایاتها ٩٨ (١٩) سُوْرَةُ مَرْيَمَ مَكِّيَّةٌ (٤٤) رکوعاتها ٦

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

كٓهٰيٰعٓصٓ ۚ ﴿١﴾

***काफ-हा-या-ऐन-सॉद*** १

ذِكْرُ رَحْمَتِ رَبِّكَ عَبْدَهٗ زَكَرِيَّا ۚ ﴿٢﴾

**हा आहे, तुझ्या पालनकर्त्याच्या त्या मेहरबानीचा उल्लेख, जी त्याने आपला सेवक जकरिय्यावर केली होती[१].** २

اِذْ نَادٰى رَبَّهٗ نِدَآءً خَفِيًّا ﴿٣﴾

**जेव्हा की, त्याने आपल्या पालनकर्त्याजवळ, गुपचुप गुपचुप दुआ केली होती[२].** ३

قَالَ رَبِّ اِنِّيْ وَهَنَ الْعَظْمُ مِنِّيْ وَاشْتَعَلَ الرَّاْسُ شَيْبًا وَّلَمْ اَكُنْۢ بِدُعَآئِكَ رَبِّ شَقِيًّا ﴿٤﴾

**की हे माझ्या पालनकर्त्या! माझी हाडे कमजोर झाली आहेत. आणि डोके म्हातारपणामुळे, भडकून उठले आहे[३]. परंतु मी कधीही तुझ्याजवळ दुआ करून, अभागी राहिलो नाही[४].** ४

وَاِنِّيْ خِفْتُ الْمَوَالِيَ مِنْ وَّرَآءِيْ وَكَانَتِ امْرَاَتِيْ عَاقِرًا فَهَبْ لِيْ مِنْ لَّدُنْكَ وَلِيًّا ﴿٥﴾

**मला माझ्या मृत्युनंतर, आपल्या नातेवाईकांची भीती आहे[५]; माझी पत्नीपण वांझ आहे; बस! तू मला आपल्याकडून[६] वारस प्रदान कर.** ५

يَّرِثُنِيْ وَيَرِثُ مِنْ اٰلِ يَعْقُوْبَ ۖ وَاجْعَلْهُ رَبِّ رَضِيًّا ﴿٦﴾

**जो माझापण वारस होईल आणि याकूब عليه السلام च्या घराण्याचा पण वारसदार. आणि हे माझ्या पालनकर्त्या! तू त्याला (आपला) मान्यता पावलेला सेवक बनवून घे** ६

يٰزَكَرِيَّآ اِنَّا نُبَشِّرُكَ بِغُلٰمِ ِۨاسْمُهٗ يَحْيٰى ۙ لَمْ نَجْعَلْ لَّهٗ مِنْ قَبْلُ سَمِيًّا ﴿٧﴾

**हे जकरिय्या! आम्ही तुला एका मुलाची खुषखबर देत आहोत; ज्याचे नांव यह्या आहे. आम्ही, याच्यापूर्वी त्याच्या सारख्या नांवाचा कोणालाही केला नाही[७].** ७

✪ हबशाच्या हिजरतच्या प्रसंगी सांगण्यात आले आहे की, हबशाचा बादशाह नज्जाशी, आणि त्याचे साथीदार आणि उमराव, यांचे समोर जेव्हा, सु.मर्यमचा सुरवातीचा भाग, ह.जाफर बिन अबीतालीब (رضي الله عنه) नी वाचून दाखविला, तेव्हात्या सर्वांच्या दाढ्या अश्रुंनी ओल्या झाल्यांत, आणि नज्जाशी म्हणाला की, हे कुरआन, आणि ह.ईसा अ. जे घेऊन आले, हे सर्व एकाच मशालीची किरणे आहेत. (फत्हुल कदीर)

१) ह.जकरिय्या عليه السلام बनी इस्राईलच्या पैगंबरांमधून आहेत. हे सुतार होते. आणि हाच धंदा, त्यांच्या आवकचे साधन होता. (स.मुस्लीम, बाब, मिन फजाईले जकरिय्या)

२) गुपचुप गुपचुप दुआ यासाठी केली की, हे एक तर अल्लाहतआलाला पसंत आहे; कारण की, याच्यांत रडणे भेंकणे, माफी व पश्चात्ताप, आणि नम्रता व व्याकुळता, जास्त असते. दुसरे असे की लोकांनी त्यांना, मूर्ख ठरवू नये की, हा म्हातारा, आता म्हातारापणांत, संतती मागत आहे. जेव्हा की संतती होण्याच्या सर्व शक्यता आता मावळून चुकल्या आहेत.

३) म्हणजे ज्या प्रमाणे लाकडे अग्नीने भडकून उठतात, अशाच प्रकारे माझे डोके, पांढरेपणाने भडकून उठले आहे. अभिप्रेत म्हातारपणाचे जाहीर करणे आहे.

४) आणि म्हणूनच, उघड साधनांच्या कमतरता असून सुद्धा, तुज जवळ संतती मागत आहे.

५) या भीतीने अभिप्रेत, हे आहे की, जर माझा कोणी वारस माझ्या प्रवचनाची आणि उपदेशाची गादी सांभाळणार नाही, तर माझ्या नातेवाईकांमध्ये, आणखी कोणी तर या पदाला लायक नाही. त्यामुळे परिणामत: माझे नातेवाईक सुद्धा तुझ्या मार्गाकडून पळ काढतील.

६) 'आपल्या जवळून' चा अर्थ हा आहे की, जरी याची उघड साधने, संपून चुकली आहेत; परंतु तू आपल्या खास कृपेने, मला संतती प्रदान कर.

७) अल्लाहतआलाने न फक्त दुआ कबूल केली, किंबहुना त्याचे नाव पण सूचवून दिले.

قَالَ رَبِّ اَنّٰى يَكُوْنُ لِىْ غُلٰمٌ وَّ كَانَتِ امْرَاَتِىْ عَاقِرًا وَّ قَدْ بَلَغْتُ مِنَ الْكِبَرِ عِتِيًّا ۝٨

जकरिय्या म्हणू लागले हे माझ्या पालनकर्त्या! माझ्याकडे मुलगा कसा जन्माला येणार, माझी पत्नी वांझ, आणि मी स्वत: वृद्धत्वाच्या कमजोरीच्या शेवटाला पोहचून चुकलो आहे[१]. ⑧

قَالَ كَذٰلِكَ ۚ قَالَ رَبُّكَ هُوَ عَلَىَّ هَيِّنٌ وَّ قَدْ خَلَقْتُكَ مِنْ قَبْلُ وَلَمْ تَكُ شَيْئًا ۝٩

सांगितले गेले की, वायदा अशाप्रकारे होऊन चुकला; तुझ्या पालनकर्त्याने सांगून दिले की, माझ्यासाठी हे फारच सोपे आहे. आणि तू स्वत: जेव्हा काहीच नव्हता, मी तुला निर्माण करून चुकलो आहे[२]. ⑨

قَالَ رَبِّ اجْعَلْ لِّىْۤ اٰيَةً ؕ قَالَ اٰيَتُكَ اَلَّا تُكَلِّمَ النَّاسَ ثَلٰثَ لَيَالٍ سَوِيًّا ۝١٠

म्हणू लागले, माझ्याकरिता, हे माझ्या पालनकर्त्या! कोणी निशाणी निश्चित करून दे. सांगितले गेले की, तुझ्याकरिता निशाणी ही आहे की, (तू) भला चंगा असून सुद्धा, तीन रात्री पर्यंत, कोण्या माणसाशी बोलूंशकणार नाही[३] ⑩

فَخَرَجَ عَلٰى قَوْمِهٖ مِنَ الْمِحْرَابِ فَاَوْحٰۤى اِلَيْهِمْ اَنْ سَبِّحُوْا بُكْرَةً وَّ عَشِيًّا ۝١١

मग जकरिय्या आपल्या खोलीतून [४] निघून, आपल्या लोकांजवळ येऊन, त्यांना इशारा करतात की, सकाळ संध्याकाळ अल्लाहतआलाचे पावित्र्य वर्णन करा[५]. ⑪

يٰيَحْيٰى خُذِ الْكِتٰبَ بِقُوَّةٍ ؕ وَ اٰتَيْنٰهُ الْحُكْمَ صَبِيًّا ۝١٢

हे यह्या! माझ्या पुस्तकाला [६] मजबुतीने धरून ठेव. आणि आम्ही त्याला बालपणीच शहाणपण प्रदान केले.[७] ⑫

وَّ حَنَانًا مِّنْ لَّدُنَّا وَ زَكٰوةً ؕ وَ كَانَ تَقِيًّا ۝١٣

आणि आपल्याकडून, कनवाळू पणा आणि पवित्राचरण सुद्धा[८], तो अल्लाहला भिऊन वागणारा माणूस होता. ⑬

१) 'आकिर' त्या स्त्रीला सुद्धा म्हणतात, जी म्हातारपणामुळे संततीला जन्म देण्याच्या क्षमतेपासून वंचित होऊन चुकली असेल; आणि तिला पण म्हणतात, जी सुरवातीपासून वांझ असेल. येथे हे दुसऱ्या अर्थात आहे. जे लाकूड वाळून जाईल, त्याला 'इतिय्या' म्हणतात. अभिप्रेत वृद्धत्वाचा शेवटचा दर्जा आहे. ज्यामुळे हाडे अकडून जातात. अर्थ हा आहे की, माझी पत्नी तर तारूण्यापासून वांझ आहे. आणि मी वृद्धत्वाच्या शेवटच्या दर्ज्यावर पोहचून चुकलो आहे. आता संतती होणे कसे शक्य आहे? असे म्हणतात की, ह.जकरिय्या عليه السلام च्या पत्नीचे नांव, अशाअ बिन्ते फाकुद बिन मेल आहे. आणि ही ह.हन्ना (मर्यमची आई) ची बहीण आहे. परंतु जास्त बरोबर हे म्हणणे वाटते की, अशाअ पण ह.इम्रानची मुलगी आहे, जे मर्यमचे वडील होते. अशाप्रकारे ह.यह्या عليه السلام व ह.ईसा عليه السلام आपसांत मावसभाऊ होते. सहीह हदीसप्रमाणे पण याचे समर्थन होते. (फत्हुल कदीर)

२) देवदुतांनी ह.जकरिय्या عليه السلام चे आश्चर्य दूर करण्यासाठी, म्हटले की, अल्लाहतआलाने तुला पुत्र देण्याचा निर्णय घेऊन टाकला आहे. त्यामुळे खचित्‌च तुला पुत्र मिळेल. हे अल्लाहसाठी मुळीच कठीण काम नाही. कारण की जेव्हा तो तुला नव्हत्याचा होता करू शकतो, तर तुला उघड साधनतसून सुद्धा, पुत्र पण देऊ शकतो.

३) रात्रींनी अभिप्रेत रात्र आणि दिवस आहेत. आणि 'सविय्या' चा अर्थ आहे, बिलकुल ठीक आणि तंदुरूस्त, म्हणजे असा काही आजार नसेल जो तुला बोलण्यापासून रोकून देईन. परंतु असे असून सुद्धा, तुझ्या तोंडाने संभाषण होऊं शकले नाही, तर समजून घ्यावे की खुषखबरीचे दिवस जवळ येऊन पोहचले आहेत.

४) 'मेहराब' ने अभिप्रेत ती खोली आहे. जिच्यांत ते अल्लाहची उपासना करीत असत. हे 'हरब' पासून आहे. ज्याचा अर्थ लढाईचा आहे. जणू उपासनागृहांत राहून, अल्लाहची उपासना करणे असे आहे, जणू तो शैतानाबरोबर लढत आहे.

५) सकाळ संध्याकाळ अल्लाहच्या तसबीहने अभिप्रेत फज्र आणि असरची नमाज आहे. किंवा हा अर्थ आहे की, या दोन वेळात अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्तुती आणि पाक साफ रहाण्याचा विशेष बंदोबस्त ठेवावा.

६) म्हणजे अल्लाहने हजरत जकरिय्या عليه السلام ला ह.यह्या عليه السلام प्रदान केले. आणि जेव्हा तो काहीसा मोठा झाला, तरी तो अजून लहान मुलच होता, त्याला अल्लाहने पुस्तकाला मजबूत धरून ठेवण्याला, म्हणजे त्यावर अंमलबजावणी करण्याचा हुकूम दिला. पुस्तकाने अभिप्रेत तौरात आहे. किंवा त्याच्यावर अवतरीत केलेले खास पुस्तक आहे, ज्याचे आता आम्हास ज्ञान नाही.

७) हुकूमाने अभिप्रेत, शहाणपण, बुद्धी, समज, पुस्तकांत असलेल्या धार्मिक आदेशांची जाण, ज्ञान आणि कर्मांची सांगड, किंवा पैगंबरी अभिप्रेत आहे. इमाम शौकानी म्हणतात की या आदेशांत काहीच रूकावट नाही, की, हुकूमामध्ये या सर्वच गोष्टी दाखल व्हाव्यात.

८) 'हनानन्' कनवाळूपणा, मेहरबानी; म्हणजे आम्ही त्याला आईबाप आणि नातेवाईकांवर, कनवाळूंपणा आणि मेहेरबानी करण्याची भावना, आणि त्याला, मनेच्छेचे अनुकरण करण्यापासून आणि पापांपासून, पावित्र्य आणि पाकी साफी पण प्रदान केली.

وَّبَرًّا بِوَالِدَيْهِ وَلَمْ يَكُنْ جَبَّارًا عَصِيًّا ﴿١٤﴾

**आणि आपल्या आई बापांशी चांगली वागणूक करणारा होता; तो शिरजोर आणि गुन्हेगार नव्हता[१] ⑭**

وَسَلٰمٌ عَلَيْهِ يَوْمَ وُلِدَ وَيَوْمَ يَمُوْتُ وَيَوْمَ يُبْعَثُ حَيًّا ﴿١٥﴾

**आणि त्याच्यावर सलाम आहे, ज्या दिवशी तो जन्मला, आणि ज्या दिवशी मरेल, आणि ज्या दिवशी जिवंत करून उठविला जाईल[२]. (त्या दिवशी) ⑮**

وَاذْكُرْ فِي الْكِتٰبِ مَرْيَمَ ۘ إِذِ انْتَبَذَتْ مِنْ أَهْلِهَا مَكَانًا شَرْقِيًّا ﴿١٦﴾

**आणि या पुस्तकांत मर्यमची पण गोष्ट वर्णन करून सांग; जेव्हा की ती आपल्या घरच्या लोकांपासून वेगळी होऊन एका पूर्वेकडील घरांत आली ⑯**

فَاتَّخَذَتْ مِنْ دُوْنِهِمْ حِجَابًا ۚ فَأَرْسَلْنَا إِلَيْهَا رُوْحَنَا فَتَمَثَّلَ لَهَا بَشَرًا سَوِيًّا ﴿١٧﴾

**आणि त्या लोकांकडून पर्दा करून घेतला[३]; मग आम्ही तिच्याजवळ आपल्या आत्म्याला (जिब्राईलला) पाठविले. मग तो तिच्या समोर, संपूर्ण मनुष्य बनून, प्रकट झाला[४] ⑰**

१) म्हणजे आपल्या आईबापांची किंवा आपल्या पालनकर्त्याचा आज्ञाभंग करणारा नव्हता. याचा अर्थ हा आहे की, जर कोणाच्या मनांत, आईबापांविषयी कनवाळूंवृत्ती व प्रेमाचा, आणि त्यांचे आज्ञापालन व सेवा आणि चांगल्या वागणुकीची भावना, अल्लाहतआला निर्माण करून देईल, तर ही त्याची खास कृपा आहे. आणि याच्या उलट भावना किंवा चाल, ही अल्लाहतआलाच्या विशेष कृपेपासून वंचित् राहण्याचा परिणाम आहे.

२) तीन प्रसंग माणसासाठी, फारच भीतीदायक असतात. (१) जेव्हा मनुष्य आईच्या पोटांतून बाहेर येतो (२) जेव्हा मृत्युचा पंजा त्याला आपल्या पकडीत घेतो (३) आणि जेव्हा त्याला कबरीतून जिवंत करून उठविले जाईल. तेव्हा तो आपल्याला हशरच्या मैदानाच्या भयावहतेत घेरलेला पावेल. अल्लाहतआलाने सांगितले, या तिन्ही जागी, त्याच्यासाठी आमच्याकडून अभय आणि अमनो अमान आहे. काही बिदअती लोक या महावाक्याने, जन्म दिवसावर, ईद मिलाद'' योग्य आहे असे सिद्ध करतात. पण कोणी त्यांना विचारले की तर मग मृत्यू दिवसावर 'ईद-ए-वफात' किंवा ''ईदे ममात' पण साजरी करणे आवश्यक झाले. कारण की ज्याप्रमाणे जन्म दिवसांसाठी 'सलाम' आहे, मृत्यु दिवसावर पण 'सलाम' आहे. जर निव्वळ 'सलाम' शब्दाने, 'ईद मिलाद' चे सिद्ध होणे शक्य आहे; तर मग याच शब्दाने 'ईद वफात' चे सिद्ध होणे, होते. परंतु येथे मृत्युची ईद तर कोठे? प्रथम पासूनच मृत्यूचे नाकारणे आहे. म्हणजे नबी ﷺ च्या मृत्युचा इनकार करून, कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याचा (नस्स) तर इनकार करतातच, स्वत: आपल्या आधाराच्या अनुषंगाने, महावाक्याच्या एका भागाला तर मानतात; आणि याच महावाक्याच्या दुसऱ्या भागाकडून, यांच्याच आधाराच्या प्रकाशांत, जे सिद्ध होते, त्याचा इनकार आहे. अफ्तुमिनुना, बि बाजील् किताबी व तकफुरूना बिबाज (सू.बकर:) म्हणजे काही आदेशांवर ईमान आणतात आणि काही आदेशांवर कुफ्र करतात.

३) हे वेगळे होणे आणि पर्दा, अल्लाहच्या उपासनेच्या आवश्यकतेमुळे होता. त्यांना कोणी पांहू नये, आणि एकाग्रता प्राप्त व्हावी; किंवा ऋतुस्त्रावापासून पाक साफ होण्यासाठी आणि पूर्वेकडील घराने अभिप्रेत, बैतुल मुकद्दसची पूर्वेकडील बाजू आहे.

४) 'रूह' ने अभिप्रेत ह. जिब्राईल عليه السلام आहेत. ज्यांना संपूर्ण मानवी रूपांत, ह.मर्यमकडे पाठविण्यात आले. ह.मर्यमने जेव्हा पाहिले, की एक माणूस बेधडक आत आलेला आहे, तर भिऊन गेली की, हा वाईट इराद्याने तर आला नसेल. ह.जिब्राईल عليه السلام नी म्हटले की, मी तो नाही, जसे तुला वाटते. किंबहुना तुझ्या पालनकर्त्याचा निरोप्या आहे. आणि हे शुभवर्तमान देण्यासाठी आलो आहे की, अल्लाहतआला तुला एक मुलगा प्रदान करणार आहे. काही किरआतींमध्ये, 'लियहब' चा सेगा गायब आहे. बोलणाऱ्याचा सेगा, (जो या किराअतमध्ये आहे.) यासाठी बोलला की, उघड साधनांच्या अनुषंगाने, ह.जिब्राईल عليه السلام नी त्यांच्या गळ्या खालील पोशाखाच्या भागांत फुंक मारली होती. ज्यामुळे, अल्लाहच्या हुकूमाने, त्यांना गर्भ राहून गेला होता. म्हणून प्रदान करण्याचा संबंध, आपल्याकडे करून घेतला; किंवा हे पण होऊं शकते की अल्लाहतआलाचे म्हणणेच असेल, आणि येथे गोष्ट म्हणून नक्कल केली गेली असेल. या अनुषंगाने शब्दांची रचना अशी होईल, ''अल्लाहने मला, तुझ्याकरीता हा संदेश देऊन पाठविले आहे की, मी तुझ्याकडे माझा निरोप्या, हे सांगण्यासाठी आला आहे की मी तुला एक पवित्र मूल प्रदान करणार आहे.'' अशा प्रकारे वगळणे आणि बोलण्याचा अंदाज, कुरआनांत कित्येक ठिकाणी आहे.

قَالَتْ إِنِّيٓ أَعُوذُ بِٱلرَّحْمَٰنِ مِنكَ إِن كُنتَ تَقِيًّا ﴿١٨﴾

**ती म्हणू लागली, मी तुजपासून रहमानचा आश्रय मागते; जर तू जरा सुद्धा अल्लाहला भिणारा आहेस (१८)**

قَالَ إِنَّمَآ أَنَا۠ رَسُولُ رَبِّكِ لِأَهَبَ لَكِ غُلَٰمًا زَكِيًّا ﴿١٩﴾

**त्याने सांगितले की मी अल्लाहचा पाठविलेला निरोप्या आहे; तुला एक पवित्र मुलगा देण्यासाठी आलो आहे (१९)**

قَالَتْ أَنَّىٰ يَكُونُ لِي غُلَٰمٌ وَلَمْ يَمْسَسْنِي بَشَرٌ وَلَمْ أَكُ بَغِيًّا ﴿٢٠﴾

**म्हणू लागली की बरे! माझ्या तेथे मूल कसे होऊ शकते? मला तर कोण्या माणसाचा हात सुद्धा लागलेला नाही; आणि मी जारकर्मीपण नाही (२०)**

قَالَ كَذَٰلِكِ قَالَ رَبُّكِ هُوَ عَلَيَّ هَيِّنٌ وَلِنَجْعَلَهُۥٓ ءَايَةً لِّلنَّاسِ وَرَحْمَةً مِّنَّا وَكَانَ أَمْرًا مَّقْضِيًّا ﴿٢١﴾

**त्याने सांगितले की, गोष्ट तर हीच आहे[१]; परंतु तुझ्या पालनकर्त्याचे म्हणणे आहे की, ते माझ्यासाठी फारच सोपे आहे; आम्ही तर त्याला लोकांसाठी एक निशाणी बनवून टाकू[२], आणि आपली विशेष[३] रहमत; ही तर एक नक्की ठरलेली गोष्ट आहे.[४] (२१)**

فَحَمَلَتْهُ فَٱنتَبَذَتْ بِهِۦ مَكَانًا قَصِيًّا ﴿٢٢﴾

**बस्! मग ती गर्भवती होऊन गेली. आणि याचमुळे ती अलग होऊन, कोठे दुरच्या जागी चालली गेली[५] (२२)**

فَأَجَآءَهَا ٱلْمَخَاضُ إِلَىٰ جِذْعِ ٱلنَّخْلَةِ قَالَتْ يَٰلَيْتَنِي مِتُّ قَبْلَ هَٰذَا وَكُنتُ نَسْيًا مَّنسِيًّا ﴿٢٣﴾

**मग प्रसुती वेदना तिला खजुरीच्या खोडाखाली घेऊन आल्यांत; आणि नकळत तिच्या तोंडातून निघून गेले की, अरेरे ! मी याच्यापूर्वीच मरून गेले असते आणि लोकांच्या आठवणीतून पण, भुलले विसरले गेले असते[६] (२३)**

१) म्हणजे ही गोष्ट तर बरोबर आहे की, तुला पुरूषाशी, जवळ जाण्याची कोणी संधी मिळाली नाही; योग्य मार्गाने किंवा अयोग्य मार्गाने, जेव्हांकी गर्भासाठी संवयीनुसार हे आवश्यक आहे.

२) म्हणजे मी संवयीच्या सबबीचा मोहताज नाही. माझ्यासाठी हे फार सोपे आहे. आणि याला आम्ही आपल्या निर्मितीच्या सामर्थ्याची एक निशाणी बनवू इच्छितो. याच्यापूर्वी आम्ही तुमचे वडील आदम यांना, पुरूष आणि स्त्री शिवाय, आणि तुमची आई हव्वाला, फक्त पुरूषापासून स्त्री शिवाय, आणि सर्व सृष्टीला, पुरूष आणि स्त्रीपासून निर्माण केले. आणि आता ईसाला निर्माण करून, चौथ्या स्वरूपामध्ये सुद्धां, निर्माण करण्यावर, आपले सामर्थ्य प्रकट करू इच्छितो; आणि ते आहे फक्त स्त्रीच्या शरीरापासून, पुरूषांशिवाय निर्माण करुन टाकणे. आम्ही निर्मितीच्या चारही प्रकारांवर समर्थ आहोत.

३) याच्याने अभिप्रेत पैगंबरी आहे. जी अल्लाहची विशेष रहमत आहे. आणि त्यांचेसाठी पण जे पैगंबरीवर ईमान आणतील.

४) हा या संभाषणाचा समारोप आहे. जो जिब्रईल عليه السلام नी अल्लाहकडून सांगितला आहे. म्हणजे ही अभूतपूर्व निर्मिती तर, अल्लाहचे ज्ञान, आणि सामर्थ्य, व मर्जीवर अवलंबून आहे.

५) म्हणजे ह.जिब्रईल عليه السلام च्या संभाषणाने ह.मर्यम काहीशी समाधानी होऊन गेली. ज्याच्यानंतर ह.जिब्रईल عليه السلام नी तिच्या पोशाखाच्या गळ्यांवरील भागांवर किंवा पदरावर फुंक मारली. अल्लाहने या फुंकीला तिच्या गर्भाशयापर्यंत पोहचवूंन दिले; ज्यामुळे ती गर्भवती होऊन गेली. गर्भ आणि प्रसव याच्यांत ९ महिन्यांचे अंतर राहिले किंवा नाही ? याच्या बाबतीत भाष्यकारांमध्ये मतभेद आहेत. काही भाष्यकार 'फन्तबजत' मध्ये 'फा' ला क्रमा क्रमाने मागे जाण्यावर ठरवून म्हणतात की, गर्भ राहताच प्रसव होऊन गेला. परंतु इमाम इब्ने कसीर म्हणतात, हे ठीक आहे की, 'फा' हा मागे जाण्यासाठी आहे. परंतु प्रत्येक गोष्टीच्या मागे जाणे, एका त्याच्या अंदाजानेच असते. आणि कुरआनाने त्यांनी याची कित्येक उदाहरणे सादर केली. यासाठी ते म्हणतात की, गर्भ बाहेर पडण्याचा प्रसंग ९ महिन्यानंतरच आला; ज्याप्रमाणे अशी सर्व साधारण सवय आहे.

६) मृत्यूची आकांक्षा या भीतीने की, मी मुलाच्या बाबतीत लोकांचे कसे काय समाधान करू शकेन, जेव्हा की माझ्या गोष्टीला कोणी मान्य करण्याला तयारच होणार नाही. आणि ही कल्पना पण मनाला क्लेश दायक होती, की कोठे माझी प्रसिद्धी एक उपासना करणारी, अल्लाहला भिणारी म्हणून होती; आणि याच्यानंतर मी, लोकांच्या नजरेत मी बदफैली ठरेल.

فَنَادٰىهَا مِنْ تَحْتِهَآ اَلَّا تَحْزَنِىْ قَدْ جَعَلَ رَبُّكِ تَحْتَكِ سَرِيًّا ﴿٢٤﴾

**इतक्यात तिला खालून आवाज देण्यात आला की तू खेद करू नकोस, तुझ्या पालनकर्त्याने, तुझ्या पायाखाली एक झरा, वाहवून काढला आहे. (२४)**

وَهُزِّىْٓ اِلَيْكِ بِجِذْعِ النَّخْلَةِ تُسٰقِطْ عَلَيْكِ رُطَبًا جَنِيًّا ﴿٢٥﴾

**आणि या खजुरीच्या खोडाला आपल्या कडे हलव, हा तुझ्यासमोर पक्के पक्के ताजे खजुर, पाडून टाकील[१] (२५)**

فَكُلِىْ وَاشْرَبِىْ وَقَرِّىْ عَيْنًا ۚ فَاِمَّا تَرَيِنَّ مِنَ الْبَشَرِ اَحَدًا ۙ فَقُوْلِىْٓ اِنِّىْ نَذَرْتُ لِلرَّحْمٰنِ صَوْمًا فَلَنْ اُكَلِّمَ الْيَوْمَ اِنْسِيًّا ﴿٢٦﴾

**आता सुखाने खा, पी. (आपले) डोळे गार कर[२]; जर तुला कोणी मनुष्य दृष्टीस पडून जाईल, तर सांगून टाक[३] की, मी अल्लाह रहमानच्या नांवाचा उपवास ठेवलेला आहे; मी आज कोण्या माणसाबरोबर बोलणार नाही (२६)**

فَاَتَتْ بِهٖ قَوْمَهَا تَحْمِلُهٗ ؕ قَالُوْا يٰمَرْيَمُ لَقَدْ جِئْتِ شَيْـًٔا فَرِيًّا ﴿٢٧﴾

**आता ह.ईसा (अ.) ला घेऊन, ती आपल्या लोकांकडे आली. सर्व म्हणूं लागले हे मर्यम ! तू फारच वाईट केलेस (२७)**

يٰٓاُخْتَ هٰرُوْنَ مَا كَانَ اَبُوْكِ امْرَاَ سَوْءٍ وَّمَا كَانَتْ اُمُّكِ بَغِيًّا ﴿٢٨﴾

**हे हारूनच्या बहिणी [४]! न तर तुझा बाप वाईट माणूस होता, न तर तुझी आई बदफैल होती. (२८)**

فَاَشَارَتْ اِلَيْهِ ؕ قَالُوْا كَيْفَ نُكَلِّمُ مَنْ كَانَ فِى الْمَهْدِ صَبِيًّا ﴿٢٩﴾

**मर्यमने आपल्या मुलाकडे इशारा केला. सर्व म्हणू लागले, अरे वा! आम्ही कुशीत असलेल्या बालकाशी कसे बोलावे? (२९)**

قَالَ اِنِّىْ عَبْدُ اللّٰهِ ؕ اٰتٰنِىَ الْكِتٰبَ وَجَعَلَنِىْ نَبِيًّا ﴿٣٠﴾

**यावर ते बालक बोलून पडले की, मी अल्लाहतआलाचा सेवक आहे त्याने मला पुस्तक दिले आहे,आणि मला आपला पैगंबर बनविला आहे.[५] (३०)**

وَّجَعَلَنِىْ مُبٰرَكًا اَيْنَ مَا كُنْتُ ۪ وَاَوْصٰنِىْ بِالصَّلٰوةِ وَالزَّكٰوةِ مَا دُمْتُ حَيًّا ﴿٣١﴾

**आणि त्याने मला आशीर्वादीत[६] (बरकतवाला) केले; जेथे पण मी असेन; आणि त्याने मला नमाज आणि जकातचा हुकूम दिला आहे; जो पर्यंत मी जिवंत राहील (३१)**

१) 'सरिय्या' लहान पाट किंवा पाण्याचा झरा. म्हणजे एक चमत्कार अल्लाहतआलाने हजरत मर्यमच्या पायाखाली पिण्यासाठी पाण्याचा आणि खाण्याकरता एका वाळलेल्या झाडाला पिकलेल्या ताज्या खजुरींची व्यवस्था करून दिली. आवाज देणारे ह.जिब्रईल عليه السلام होते. ज्यांनी दरीच्या खालून आवाज दिला. आणि असे म्हटले जाते की, 'सरीय्यून' सरदाराच्या अर्थांत आहे. आणि याच्याने अभिप्रेत ह.ईसा عليه السلام आहेत; आणि त्यांनीच हजरत मर्यमला खालून आवाज दिला होता.

२) म्हणजे खजुर खा, झऱ्याचे पाणी पी, आणि मुलाला पाहून डोळे गार कर.

३) हे म्हणणे पण इशाऱ्याने होते, जिभेने नाही. याशिवाय त्यांच्याकडे उपासाचा अर्थच, खाणे आणि बोलणे, यापासून वाचण्याचा होता.

४) हारून ने अभिप्रेत शक्य आहे, त्यांचा कोणी सख्खा किंवा सावत्र भाऊ असेल. हे ही शक्य आहे की हारूनने अभिप्रेत, हारून पैगंबर (मूसा عليه السلام चे भाऊ) पण असावे. आणि अरबांच्या प्रमाणे त्यांचा, भावाचा संबंध, हारून عليه السلام कडे करून दिला. जसे की म्हटले जाते या अखा तेमीम! या अखा अल अरब, वगैरे. किंवा ईशभय, पावित्र्य आणि उपासनामध्ये ह.हारून عليه السلام सारखे त्यांना समजत. त्यांना तुलनेत त्यांना हारूनाच्या बहिणी म्हटले गेले असावे. याची उदाहरणे पण कुरआन करीममध्ये उपलब्ध आहेत. (अयसरुत तफासीर व इब्ने कसीर)

५) म्हणजे भाग्यामध्ये अल्लाहने माझ्यासाठी फैसला केला आहे, की तो मला पुस्तक आणि पैगंबरी देईन.

६) अल्लाहच्या धर्मांत, दृढ जमून रहाणे, किंवा प्रत्येक गोष्टीत जास्त, उच्चत्व, आणि यश, हे माझ्या दैवांत आहे. किंवा लोकांकरीता फायदेकारक, भलाईचे शिक्षण देणारा, किंवा चांगल्या कामाचा हुकूम देणारा, आणि वाईट गोष्टीकडून मना करणारा.

| | |
|---|---|
| وَّبَرًّا بِوَالِدَتِیْ وَلَمْ یَجْعَلْنِیْ جَبَّارًا شَقِیًّا ﴿۳۲﴾ | आणि त्याने मला आपल्या आईचा सेवाधर्म तत्पर बनविले आहे[१]. आणि मला शिरजोर आणि हतभागी बनविले नाही [२] ३२ |
| وَالسَّلٰمُ عَلَیَّ یَوْمَ وُلِدْتُّ وَیَوْمَ اَمُوْتُ وَیَوْمَ اُبْعَثُ حَیًّا ﴿۳۳﴾ | आणि मला माझ्या जन्माच्या दिवसावर, आणि माझ्या मृत्यूच्या दिवशी, आणि ज्या दिवशी मी दुसऱ्यांदा जिवंत उभा केला जाईल, सलामच सलाम (शांती व अभय) आहे. ३३ |
| ذٰلِكَ عِیْسَی ابْنُ مَرْیَمَ ۚ قَوْلَ الْحَقِّ الَّذِیْ فِیْهِ یَمْتَرُوْنَ ﴿۳۴﴾ | ही आहे खरी गोष्ट; ईसा बिन मर्यमची. हीच आहे ती सत्य गोष्ट, जिच्यांत लोक शंका कुशंकामध्ये व्यस्त आहेत [३] ३४ |
| مَا كَانَ لِلّٰهِ اَنْ یَّتَّخِذَ مِنْ وَّلَدٍ ۙ سُبْحٰنَهٗ ؕ اِذَا قَضٰۤی اَمْرًا فَاِنَّمَا یَقُوْلُ لَهٗ كُنْ فَیَكُوْنُ ﴿۳۵﴾ | अल्लाहतआलाची ही शान नाही की त्याने आपल्यासाठी संतती निर्माण करावी. तो तर फारच परम पवित्र आहे; तो तर जेव्हा कोण्या कामाला करण्याचा इरादा करतो, तर सांगून देतो की, होऊन जा! ते त्याच वेळी होऊन जाते. [४] ३५ |
| وَاِنَّ اللّٰهَ رَبِّیْ وَرَبُّكُمْ فَاعْبُدُوْهُ ؕ هٰذَا صِرَاطٌ مُّسْتَقِیْمٌ ﴿۳۶﴾ | आणि खचितच माझा आणि तुम्हा सर्वांचा पालनकर्ता, फक्त अल्लाहतआलाच आहे; तुम्ही सर्व त्याचीच उपासना करा; हाच सरळमार्ग आहे. ३६ |
| فَاخْتَلَفَ الْاَحْزَابُ مِنْۢ بَیْنِهِمْ ۚ فَوَیْلٌ لِّلَّذِیْنَ كَفَرُوْا مِنْ مَّشْهَدِ یَوْمٍ عَظِیْمٍ ﴿۳۷﴾ | मग हे पंथ आपसांत मतभेद करू लागले[५]; मग काफिरांकरीता (फारच) वैल (दु:खाची गोष्ट) आहे, त्या मोठ्या दिवसाच्या येऊन जाण्यावर [६] ३७ |

१) फक्त आईशी चांगल्या वागणुकीच्या उल्लेखाने, पण स्पष्ट आहे की, इ.ईसा عليه السلام चा जन्म, बापाशिवाय, एका अभूतपूर्व प्रकारे झाला आहे. नाही तर ह.ईसा عليه السلام सुद्धां, ह.यह्या عليه السلام प्रमाणे 'बर्रअम बिवालि दयहि' (आई बापाबरोबर चांगली वागणूक करणारा) म्हणाले असते; हे म्हटले नसते की मी आईबरोबर चांगली वागणूक करणारा आहे.

२) याचा अर्थ हा आहे की, जो आईबापाचा सेवाधर्म तत्पर आणि आज्ञापालन करणारा नसतो, त्याच्या स्वभावांत शिरजोरी, आणि दैवात हत्भागी लिहिलेले असते. ह.ईसा عليه السلام नी सर्व संभाषण भूतकाळानुसार केले आहे. वास्तविक या सर्व गोष्टींचा संबंध भविष्यकाळाशी होता. कारण आतांतर ते, दूध पिणारे तान्हे मूलच होते. हे यासाठी की, अल्लाहचे दैवाचे असे अटळ निर्णय होते की, जणूंआतांहे प्रकट होण्याच्या अवस्थेत आलेले नव्हते, परंतु त्यांचे घडून येणे अशा प्रकारे निश्चित होते, ज्याप्रमाणे भूतकाळांत होऊन चुकलेल्या घटना, शंका कुशंकेपासून दूर असतात.

३) म्हणजे ही आहे ती वैशिष्टये, ज्यांच्याने ह.ईसा عليه السلام शृंगारीत होते. त्या वैशिष्ट्यवाले नव्हते, जे खिस्त्यांनी मर्यादेबाहेर जाऊन, त्यांच्या बाबतीत सांगितले, तसेच न अशी वैशिष्ट्ये, जे यहूद्यांनी, कमी आणि द्वेषाने प्रेरीत होऊन त्यांच्या बाबतीत सांगितले. आणि हीच सत्य गोष्ट आहे, जिच्यांत लोक निष्कारण शंका घेतात.

४) ज्या अल्लाहची ही शान आणि सामर्थ्य असेल, त्याला संततीची का बरे, आवश्यकता? आणि अशाच प्रकारे, त्याच्या करिता बापाशिवाय, निर्माण करून देणे कोणते कठीण काम आहे? जणू जे अल्लाहसाठी संतती सिद्ध करतात, किंवा ह.ईसाच्या अभूतपूर्व जन्माचा इन्कार करतात, ते मुळांत अल्लाहचे सामर्थ्य आणि शक्तीला नाकारणारे आहेत.

५) येथे 'अल्अहजाब' ने अभिप्रेत, ग्रंथधारी लोकांचे पंथ, आणि खुद्द खिसत्यांचे पंथ आहेत. ज्यांनी ह.ईसा عليه السلام च्या बाबतीत, आपसांत मतभेद केला. यहूद्यांनी म्हटले की तो जादुगीर आणि व्याभिचाराने जन्मलेला, म्हणजे यूसुफ नज्जारचा मुलगा आहे. खिस्त्यांच्या प्रोटेस्टंट पंथाने म्हटले की ते अल्लाहचे पुत्र आहेत. कॅथोलिक पंथाने म्हटले की ते तीन परमेश्वरांतून तिसरे आहेत. तिसरा पंथ आर्थोडॉक्स ने म्हटले, ते अल्लाह आहेत. मग यहूद्यांनी त्यांना कमी लेखले आणि खिस्त्यांनी त्यांना मर्यादेबाहेर नेले, आणि त्यांच्यावर कुभांड रचले (अयसरूत तफासीर, फत्हुल कदीर)

६) या काफिरांसाठी, ज्यांनी ह.ईसा عليه السلام च्या बाबतीत, अशाप्रकारे मतभेद, आणि कमी लेखले आणि खोटा आळ घेतला, कयामतच्या दिवशी, जेव्हा तेथे हजर होतील, बर्बादी आहे.

| | |
|---|---|
| ज्या दिवशी ते आमच्यासमोर हजर होतील, काय खूप पाहणारे आणि ऐकणारे होतील[१]. परंतु आज तर हे अन्यायी लोक खुल्या भ्रमांत पडले आहेत ३८ | اَسۡمِعۡ بِهِمۡ وَاَبۡصِرۡ ۙ يَوۡمَ يَاۡتُوۡنَنَا لٰـكِنِ الظّٰلِمُوۡنَ الۡيَوۡمَ فِىۡ ضَلٰلٍ مُّبِيۡنٍ ۝٣٨ |
| तू यांना या क्लेश आणि खेदाच्या दिवसाची [२] भीती दाखव, आणि जेव्हा की, काम पूर्ण करून टाकले जाईल[३]. आणि हे लोक फसगतीत आणि ईमान न आणण्यात, राहून जातील ३९ | وَاَنۡذِرۡهُمۡ يَوۡمَ الۡحَسۡرَةِ اِذۡ قُضِىَ الۡاَمۡرُ ۘ وَهُمۡ فِىۡ غَفۡلَةٍ وَّهُمۡ لَا يُؤۡمِنُوۡنَ ۝٣٩ |
| स्वत: जमिनीचे आणि जमीनवाल्यांचे वारस आम्हीच होऊ; आणि सर्व लोक, आमच्याकडे परतवून आणले जातील ४० | اِنَّا نَحۡنُ نَرِثُ الۡاَرۡضَ وَمَنۡ عَلَيۡهَا وَاِلَيۡنَا يُرۡجَعُوۡنَ ۝٤٠ |
| आणि या पुस्तकांत इब्राहीमची गोष्ट वर्णन कर, नि:संशय ते मोठे सात्विक पैगंबर होते[४] ४१ | وَاذۡكُرۡ فِى الۡكِتٰبِ اِبۡرٰهِيۡمَ ۬ ؕ اِنَّهٗ كَانَ صِدِّيۡقًا نَّبِيًّا ۝٤١ |
| जेव्हांकी त्याने आपल्या बापाला म्हटले, की हे माझ्या पित्या! तुम्ही त्यांची पुजा अर्चा का करीता, जे न ऐकत आणि न पाहत? न आपणास कुठलाही फायदा पोहचवू शकतात ४२ | اِذۡ قَالَ لِاَبِيۡهِ يٰۤاَبَتِ لِمَ تَعۡبُدُ مَا لَا يَسۡمَعُ وَلَا يُبۡصِرُ وَلَا يُغۡنِىۡ عَنۡكَ شَيۡـًٔـا ۝٤٢ |
| हे माझ्या पित्या! आपण पहा की, माझ्याजवळ ते ज्ञान आले आहे; जे आपल्याजवळ आलेच नाही[५]; तर आपण माझेच मानावे, मी बिलकुल सरळ मार्गाकडे, आपले मार्गदर्शन करीन [६] ४३ | يٰۤاَبَتِ اِنِّىۡ قَدۡ جَآءَنِىۡ مِنَ الۡعِلۡمِ مَا لَمۡ يَاۡتِكَ فَاتَّبِعۡنِىۡۤ اَهۡدِكَ صِرَاطًا سَوِيًّا ۝٤٣ |

१) हे आश्र्चर्याचे उद्‌गार आहेत, म्हणजे जगांत तर हे सत्य पाहण्याला आणि ऐकण्यापासून, आंधळे आणि बहिरे राहिले; परंतु परलोकांत, ते किती चांगले पाहणारे आणि ऐकणारे असतील? परंतु तेथे हे पाहणे, ऐकणे काय कामाचे?

२) कयामतच्या दिवसाला खेदाचा दिवस म्हटले की, यासाठी की, त्या दिवशी सर्वच खेद करतील; बद फैल खेद करतील की, त्यांनी वाईट कृत्ये केली नसती तर बरे झाले असते! आणि सदाचरणी या गोष्टींवर खेद करतील, की, त्यांनी आपल्या जास्त पुण्य का कमविले नाही?

३) म्हणजे लेखा जोखा करून, कर्मपत्रे गुंडाळून ठेवून दिली जातील. आणि स्वर्गवासी स्वर्गांत, आणि नर्कवासी नरकाग्नीत चालले जातील. हदीसमध्ये येते की, याच्या नंतर मृत्यूला, एका मेंढ्याच्या रूपांत, आणले जाईल; आणि स्वर्ग आणि नर्काच्या दर्म्यान, उभे करून दिले जाईल. स्वर्गवासी आणि नर्कवासी, दोघांना विचारले जाईल, याला ओळखतात, हे काय आहे? ते म्हणतील होय! हा तर मृत्यू आहे. मग त्यांच्या समोर त्याला जबाह करून टाकले जाईल. आणि घोषणा करून दिली जाईल, अहो स्वर्गवाल्यांनो! तुमच्यासाठी स्वर्गाचे जीवन कायमसाठी आहे. आता मृत्यू येणार नाही. नर्कवासियांना सांगितले जाईल, अहो नर्कवाल्यांनो! तुमच्यासाठी ही नरकाग्नीची शिक्षा कायमची आहे. आता मृत्यू येणार नाही. (स.बुखारी सू.मर्यम, आणि स.मुस्लिम)

४) 'सिद्दीक' सिदक (सत्यता) पासून अतिशयोक्तीचा सेगा आहे. म्हणजे फारच सत्यवादी. म्हणजे ज्याच्या उक्तीत आणि कृतीत, सारखेपणा आणि सत्यता याची झलक असेल. सत्त्यत्वाचे हे स्थान, पैगंबरीनंतर, सर्वांत उच्च आहे. प्रत्येक पैगंबर पण, आपल्या काळांतील सर्वांत मोठा सत्यवादी, प्रामाणिक असतो. म्हणूनच तो खरा पण असतो. तथापि प्रत्येक सिद्दीक पैगंबर नसतो. कुरआन करीममध्ये ह.मर्यमला सिद्दीका म्हणण्यात आले आहे. ज्याचा अर्थ हा आहे की, ती ईशभय व पावित्र्य आणि खरे बोलणे, यात फार उच्च स्थानावर विराजमान होती. तथापि पैगंबर नव्हती. उम्मते मोहम्मदियामध्ये सुद्धा सिद्दीकीन आहे आणि यांच्यात यादीत प्रथम ह.अबुबकर सिद्दीक رضي الله عنه आहेत. जे, पैगंबरानंतर उम्मतमध्ये खैरूल बशर (मनुष्य मात्रांत उत्कृष्ट) मान्य केले गेले आहेत. रजी अल्लाहु अनहु.

५) ज्याच्याने मला अल्लाहची ओळख आणि त्याचा विश्वास प्राप्त झाला. मृत्यूनंतर पुन्हा उठणे, आणि गैरूल्लाहच्या पुजाऱ्या करीता कायमच्या शिक्षेचे ज्ञान झाले.

६) जी तुम्हास कायमच्या सुदैव आणि मुक्तीला मिळवून देईन.

يَابَتِ لَا تَعۡبُدِ الشَّيۡطٰنَ ؕ اِنَّ الشَّيۡطٰنَ كَانَ لِلرَّحۡمٰنِ عَصِيًّا ﴿۴۴﴾

**हे माझ्या पित्या! तुम्ही शैतानाची उपासना करण्यापासून परावृत्त होऊन जावे; शैतान तर दया आणि कृपावाल्या अल्लाहतआलाचा मोठाच आज्ञाभंजक आहे[१]. ४४**

يَابَتِ اِنِّىۡۤ اَخَافُ اَنۡ يَّمَسَّكَ عَذَابٌ مِّنَ الرَّحۡمٰنِ فَتَكُوۡنَ لِلشَّيۡطٰنِ وَلِيًّا ﴿۴۵﴾

**हे माझ्या पित्या! मला भीती वाटते की, कोठे आपणावर अल्लाहची शिक्षा न येऊन पडावी, की आपण शैतानाचे साथी बनून जावे.[२] ४५**

قَالَ اَرَاغِبٌ اَنۡتَ عَنۡ اٰلِهَتِىۡ يٰۤاِبۡرٰهِيۡمُ ۚ لَـئِنۡ لَّمۡ تَنۡتَهِ لَاَرۡجُمَنَّكَ وَاهۡجُرۡنِىۡ مَلِيًّا ﴿۴۶﴾

**त्याने उत्तर दिले की, हे इब्राहीम! काय तू आमच्या उपास्याकडून तोंड फिरवित आहेस? (ऐक!) जर तू यापासून परावृत्त झाला नाहीस, तर मी तुला धोंडमार करून टाकीन. जा! एका दिर्घ मुदतीपर्यंत, माझ्यापासून[३] वेगळा रहा ४६**

قَالَ سَلٰمٌ عَلَيۡكَ ۚ سَاَسۡتَغۡفِرُ لَكَ رَبِّىۡ ؕ اِنَّهٗ كَانَ بِىۡ حَفِيًّا ﴿۴۷﴾

**(त्याने) म्हटले की, बरे! तुमच्यावर सलाम असो[४]; मी तर आपल्या पालनकर्त्याकडे, तुमच्या क्षमेची प्रार्थना करीत [५] राहीन; तो माझ्यावर फारच मेहेरबान आहे. ४७**

وَاَعۡتَزِلُكُمۡ وَمَا تَدۡعُوۡنَ مِنۡ دُوۡنِ اللّٰهِ وَاَدۡعُوۡا رَبِّىۡ ۖ عَسٰٓى اَلَّاۤ اَكُوۡنَ بِدُعَآءِ رَبِّىۡ شَقِيًّا ﴿۴۸﴾

**आणि मी तर तुम्हास पण, आणि ज्यांना ज्यांना तुम्ही अल्लाहच्या शिवाय बोलावितात त्यांना पण, सर्वांना सोडून मी जात आहे. फक्त आपल्या पालनकर्त्याला बोलावित राहीन; मला खात्री आहे की, मी आपल्या पालनकर्त्याकडे दुआ मागण्यापासून वंचित राहणार नाही ४८**

فَلَمَّا اعۡتَزَلَهُمۡ وَمَا يَعۡبُدُوۡنَ مِنۡ دُوۡنِ اللّٰهِ ۙ وَهَبۡنَا لَهٗۤ اِسۡحٰقَ وَيَعۡقُوۡبَ ؕ وَكُلًّا جَعَلۡنَا نَبِيًّا ﴿۴۹﴾

**जेव्हा इब्राहीम त्या सर्वांना, आणि अल्लाहच्या शिवाय, त्यांच्या सर्व उपास्यांना सोडून चुकले, तेव्हा आम्ही त्यांना इस्हाक व याकूब प्रदान केलेत[६]; आणि दोघांना पैगंबर बनवून टाकले ४९**

१) म्हणजे शैतान जे वाईट विचार मनांत टाकतो आणि बहकवतो, त्यामुळे आपण अशा मुर्तींची उपासना करतात, ज्या ऐकण्या पाहण्याची शक्ती बाळगत नाही; आणि न नफा नुकसान पोहचविण्यांचे सामर्थ्य. तर ही खरे पाहतां, शैतानाचीच उपासना आहे; जो अल्लाहचा (नाफरमान) आज्ञाभंजक आहे. आणि दुसऱ्यांना पण अल्लाहचा आज्ञाभंजक बनवून, त्यांना आपल्या सारखेच बनविण्यासाठी त्याचा अट्टाहास आहे.

२) जर आपण आपल्या शिर्क आणि कुफ्रवरच बाकी राहिलेत, आणि या स्थितीत आपला मृत्यू झाला, तर अल्लाहच्या शिक्षेपासून आपणांस कोणी वाचवू शकणार नाही. किंवा या जगातच आपण शिक्षेला बळी पडून जावे. आणि शैतानाचे जोडीदार बनून, नेहमीसाठी अल्लाहच्या दरबारातून बहिष्कृत होऊन जावे. ह.इब्राहीम عليه السلام नी बापाच्या आदर सन्मानांला पूर्णपणे संरक्षित ठेवून फारच कनवाळूवृत्तीने आणि प्रेमाने, बापाला एकेश्वर वादाचा उपदेश केला. परंतु एकेश्वरवादाचा हा धडा कितीही गोडीने आणि नम्रतेच्या सुरांत सांगितला जावा, मुशरिकसाठी तो सहन करण्याच्या पलिकडे असतो. म्हणून मुशरिक पित्याने या नम्रता आणि प्रेमाच्या उत्तरांत, फारच सक्त आणि कडक भाषेत, एकेश्वरवादी पुत्राला सांगितले की, जर तू माझ्या उपास्यांकडून तोंड फिरविण्यापासून परावृत्त झाला नाहीस, तर मी तुला धोंडमार करून टाकीन.

३) मलीय्या, दिर्घ मुदत, एक काळ, दुसरा अर्थ याचा ठिकठाक आणि तन्दुरूस्तचा केला गेला आहे; म्हणजे मला माझ्या स्थितीवर सोडून दे. माझ्याकडून कोठे आपले हात पाय तोडून घेऊ नकोस.

४) हा रहमतवाला सलाम नाही, जो एक मुसलमान दुसऱ्या मुसलमानाला करतो. किंबहुना संबोधन संपल्याचा निदर्शक आहे. जसे ''व इजा खातबहुमुल जाहिलुना कालु सलामा'' म्हणजे जेव्हा अडाणी लोक त्यांच्याशी वाद घालतात तर ते म्हणतात की सलाम आहे. (सू.फुरकान-६३) मध्ये इमानवाल्यांची आणि अल्लाहच्या सेवकांची पद्धत दाखविली गेली आहे.

५) हे त्यावेळी म्हटले होते, जेव्हा ह.इब्राहीम عليه السلام ला, मुशरिकासाठी क्षमेची प्रार्थना करण्याच्या मनाईचे ज्ञान नव्हते; जेव्हा हे ज्ञान झाले तेव्हा त्यांनी दुआ करणे, बंद करून टाकले. (सू.तौबा-११४)

६) ह.याकूब عليه السلام ह. इस्हाकचे पुत्र, म्हणजे इब्राहीम عليه السلام चे नातू होते. अल्लाहतआलाने त्यांचा उल्लेखपण, पुत्राबरोबर, आणि पुत्रा प्रमाणे केला. अर्थ हा आहे की, जेव्हा ह.इब्राहीम عليه السلام, अल्लाहच्या एकेश्वरवादासाठी, बापाला, घराला, आणि आपल्या प्रिय जन्मभूमीला सोडून, येरूशलेमच्या मुलुखाकडे स्वदेश त्याग करून गेले, तेव्हा आम्ही त्यांना इस्हाक व याकूब عليه السلام प्रदान केलेत. यासाठी की यांचे प्रेम आणि लगाव, यामुळे त्यांनी बापाच्या विरहाच्या दु:खाला, विसरून जावे.

وَوَهَبۡنَا لَهُمۡ مِّنۡ رَّحۡمَتِنَا وَجَعَلۡنَا لَهُمۡ لِسَانَ صِدۡقٍ عَلِيًّا ۝٥٠

**आणि त्या सर्वांवर आम्ही, आपल्या पुष्कळशा रहमती केल्यात[१]. आणि आम्ही त्यांची कीर्ती, उच्च दर्जाची करून टाकली[२]. ५०**

وَاذۡكُرۡ فِي الۡكِتٰبِ مُوۡسٰٓى ۚ اِنَّهٗ كَانَ مُخۡلَصًا وَّكَانَ رَسُوۡلًا نَّبِيًّا ۝٥١

**आणि या कुरआनांत मूसाचा पण उल्लेख कर; जो निवडून[३] घेतलेला आणि रसूल व नबी होता ५१**

وَنَادَيۡنٰهُ مِنۡ جَانِبِ الطُّوۡرِ الۡاَيۡمَنِ وَقَرَّبۡنٰهُ نَجِيًّا ۝٥٢

**आणि आम्ही त्याला तूर पर्वताच्या उजव्या बाजूने हांक मारली. आणि गुप्त गोष्टी करण्यासाठी त्याला आम्ही जवळ करून घेतले ५२**

وَوَهَبۡنَا لَهٗ مِنۡ رَّحۡمَتِنَاۤ اَخَاهُ هٰرُوۡنَ نَبِيًّا ۝٥٣

**आणि आपल्या खास रहमतने त्याचा भाऊ 'हारून' यास नबी बनवून दिले ५३**

وَاذۡكُرۡ فِي الۡكِتٰبِ اِسۡمٰعِيۡلَ ۚ اِنَّهٗ كَانَ صَادِقَ الۡوَعۡدِ وَكَانَ رَسُوۡلًا نَّبِيًّا ۝٥٤

**आणि या पुस्तकात इस्माईलची गोष्ट पण वर्णन कर, तो फारच वायद्याचा पक्का होता. आणि होता पण पैगंबर आणि नबी. ५४**

وَكَانَ يَاۡمُرُ اَهۡلَهٗ بِالصَّلٰوةِ وَالزَّكٰوةِ ۖ وَكَانَ عِنۡدَ رَبِّهٖ مَرۡضِيًّا ۝٥٥

**आणि तो आपल्या कुटुंबास, बरोबर नमाज आणि जकातचा हुकूम देत असे; आणि आपल्या पालनकर्त्याच्या दरबारात, आवडता आणि मान्यता पावलेला होता ५५**

وَاذۡكُرۡ فِي الۡكِتٰبِ اِدۡرِيۡسَ ۚ اِنَّهٗ كَانَ صِدِّيۡقًا نَّبِيًّا ۝٥٦

**आणि या पुस्तकांत 'इद्रिस' चा पण उल्लेख कर. तो पण सत्यशील पैगंबर होता. ५६**

وَّرَفَعۡنٰهُ مَكَانًا عَلِيًّا ۝٥٧

**आणि आम्ही त्याला अत्युच्च स्थानी उचलून घेतले[४] ५७**

१) म्हणजे पैगंबरीच्या शिवाय सुद्धा, आणखी पुष्कळशा दया-कृपा आम्ही त्यांच्यावर केल्यात. उदाहरणार्थ, संपत्ती, आणखी संतती; आणि मग यांच वंशाच्या शृंखलेत, बऱ्याच कालावधी पर्यंत, पैगंबरीच्या शृंखलेला चालू ठेवले, ही सर्वांत मोठी दया होती. जी यांच्यावर झाली. याचसाठी, ह.इब्राहीम عليه السلام पैगंबरांचे वडील किंवा, पैगंबरांच्या वडीलांचे, वडील म्हणवले जातात.

२) 'लिसान सिदकिन' ने अभिप्रेत, गुण गौरव आणि सुंदर सुंदर नांवानी स्मरण करणे आहे. जिभेचा संबंध, योग्यतेशी केला. आणि मग त्याची खुबी व महत्ता वर्णन केली, ज्याच्याने याकडे इशारा केला की, सेवकांच्या जिभेवर तो त्यांचा गुणगौरव रहातो, तर ते खरोखरच याला पात्र आहेत. म्हणून पहा की तमाम आकाशी धर्मांना मानणारे, किंबहुना मुशरिक सुद्धा, ह.इब्राहीम عليه السلام आणि त्यांच्या संततीची चर्चा, फार चांगल्या शब्दात आणि फारच आदर सन्मानाने करतात. हे पैगंबरी आणि संतती नंतर, आणखी एक बक्षीस आहे; जे त्यांना अल्लाहच्या मार्गात हिजरत (स्वदेश त्याग) केल्यामुळे प्राप्त झाले.

३) मुखलस, मुस्तफा, मुजतबा, आणि मुखतार, चारही शब्दांचा भावार्थ एकच आहे. म्हणजे पैगंबरीसाठी, निवडून घेतलेला, आवडता मनुष्य, 'रसूल' चा अर्थ पाठविलेला असा आहे. आणि 'नबी' चा अर्थ, अल्लाहचा (पैगाम) संदेश लोकांना ऐकवणारा, किंवा अल्लाहच्या वह्यची लोकांना बातमी देणारा. तथापि भावार्थ दोघांचा एकच आहे. की, ज्या सेवकाला, अल्लाह लोकांच्या हिदायत आणि मार्गदर्शनासाठी निवडून घेतो, आणि त्याला आपले वह्य प्रदान करतो, त्याला रसूल आणि नबी म्हटले जाते. फार पूर्वीपासून, ज्ञानी लोकात, एक वाद हा चालत आला आहे की, काय दोघांमध्ये काही फरक आहे किंवा नाही? जर आहे तर तो कोणता? फरक करणारे सर्वसाधारण म्हणतात की, धर्मशास्त्रवाल्यांना किंवा पुस्तकवाल्यांना 'रसूल' आणि नबी म्हणण्यात येते. आणि जो पैगंबर आपल्या पूर्वीच्या पैगंबराचे पुस्तक किंवा धर्मशास्त्र, याच्याप्रमाणेच लोकांना अल्लाहचा संदेश पोहचवित राहिला, तो फक्त नबी आहे, रसूल नाही. तथापि कुरआन करीममध्ये, याचा उपयोग, एका दुसऱ्यावरपण झाला आहे.

४) ह.इद्रिस عليه السلام च्या बाबतीत असे म्हटले जाते की, ह.आदम عليه السلام नंतर पहिले पैगंबर झाले. आणि ह.नूह عليه السلام किंवा त्यांच्या वडिलांचे आजोबा होते. त्यांनीच पहिल्या प्रथम कपडे शिवले. उंच स्थानाने काय अभिप्रेत आहे? काही भाष्यकारांनी याचा भावार्थ, आकाशावर उचलले गेले' असा समजला आहे की, ह.ईसा عليه السلام प्रमाणे त्यांना पण आकाशावर उचलून घेण्यांत आले. परंतु कुरआन करीमचे शब्द या भावार्थासाठी स्पष्ट नाहीत. आणि कोण्या स.हदीसमध्ये सुद्धा, हे वर्णन करण्यात आलेले नाही. तथापि इस्राईली रिवायतीमध्ये, यांना आकाशांत उचलून घेण्याचा उल्लेख मिळतो; जो या भावार्थाला सिद्ध करण्याला पुरेसा नाही. म्हणून जास्त बरोबर हीच गोष्ट वाटते की, याच्याने अभिप्रेत, मर्तब्याची ती उंची आहे, जी पैगंबरी देऊन, त्यांना देण्यात आली. वल्लाह आलम!

أُولٰٓئِكَ الَّذِيْنَ اَنْعَمَ اللّٰهُ عَلَيْهِمْ مِّنَ النَّبِيّٖنَ
مِنْ ذُرِّيَّةِ اٰدَمَ ۗ وَمِمَّنْ حَمَلْنَا مَعَ نُوْحٍ ۫ وَّمِنْ
ذُرِّيَّةِ اِبْرٰهِيْمَ وَاِسْرَآءِيْلَ ۫ وَمِمَّنْ هَدَيْنَا
وَاجْتَبَيْنَا ؕ اِذَا تُتْلٰى عَلَيْهِمْ اٰيٰتُ الرَّحْمٰنِ خَرُّوْا
سُجَّدًا وَّبُكِيًّا ۩ ۝٥٨

हेच ते पैगंबर आहेत, ज्यांचेवर अल्लाहतआलाने कृपा केली; जे आदमच्या संततीमधून आहेत; आणि त्या लोकांच्या वंशातून आहेत, ज्यांना आम्ही ‘नूह’ च्या बरोबर, नावेत चढवून घेतले होते. आणि इब्राहीम आणि याकूबच्या संततीमधून, आणि आमच्याकडून सन्मार्ग दाखविले गेलेले, आणि आमच्या आवडत्या लोकांमधून, यांच्यासमोर जेव्हांअल्लाह रहमानची महावाक्ये वांचून दाखविली जात असत, तेव्हा ते सजदा करत, रडत भेंकत पालथे पडून जात (१) ५८

فَخَلَفَ مِنْۢ بَعْدِهِمْ خَلْفٌ اَضَاعُوا الصَّلٰوةَ
وَاتَّبَعُوا الشَّهَوٰتِ فَسَوْفَ يَلْقَوْنَ غَيًّا ۝٥٩

मग त्यांच्या नंतर असे निखट्टू लोक निर्माण झाले की ज्यांनी नमाज गमविली; आणि कामवासनेच्या नादी लागले तर त्यांचे नुकसान त्यांच्यापुढे येईल (२) ५९

اِلَّا مَنْ تَابَ وَاٰمَنَ وَعَمِلَ صَالِحًا فَاُولٰٓئِكَ يَدْخُلُوْنَ
الْجَنَّةَ وَلَا يُظْلَمُوْنَ شَيْـًٔا ۝٦٠

त्यांच्याशिवाय की जे पश्चात्ताप व्यक्त करतील, आणि ईमान आणतील, आणि चांगली कामे करतील, असे लोक स्वर्गात जातील; आणि त्यांचा जरा देखील हक्क मारला जाणार नाही. (३) ६०

جَنّٰتِ عَدْنِ ِۨالَّتِيْ وَعَدَ الرَّحْمٰنُ عِبَادَهٗ بِالْغَيْبِ ؕ اِنَّهٗ
كَانَ وَعْدُهٗ مَاْتِيًّا ۝٦١

नेहमी राहण्याच्या बागांत (स्वर्गात) ज्यांचा ‘परोक्ष’ वायदा(४), अल्लाह रहमानने आपल्या सेवकांशी केला आहे; नि:संशय त्याचा वायदा येणारच आहे. ६१

لَا يَسْمَعُوْنَ فِيْهَا لَغْوًا اِلَّا سَلٰمًا ؕ وَلَهُمْ رِزْقُهُمْ فِيْهَا
بُكْرَةً وَّعَشِيًّا ۝٦٢

ते लोक तेथे कोणतीही निरर्थक गोष्ट ऐकणार नाहीत; फक्त सलामचा सलाम ऐकतील (५) त्यांच्या करिता तेथे सकाळ सांज, त्यांचे भोजन त्यांना प्राप्त होईल(६) ६२

تِلْكَ الْجَنَّةُ الَّتِيْ نُوْرِثُ مِنْ عِبَادِنَا مَنْ كَانَ تَقِيًّا ۝٦٣

हा आहे तो स्वर्ग, ज्याचा वारस, आम्ही आपल्या सेवकांमधून त्यांना बनवितो जे (आम्हास ) भिऊन वागणारे आहेत ६३

وَمَا نَتَنَزَّلُ اِلَّا بِاَمْرِ رَبِّكَ ۚ لَهٗ مَا بَيْنَ اَيْدِيْنَا وَمَا
خَلْفَنَا وَمَا بَيْنَ ذٰلِكَ ۚ وَمَا كَانَ رَبُّكَ نَسِيًّا ۝٦٤

आणि आम्ही तुझ्या पालनकर्त्याच्या हुकूमाशिवाय उतरू शकत नाही(७); आमच्या पुढे मागे, आणि त्यांच्या दर्म्यानच्या सर्व वस्तू त्याच्या मालकीत आहे; तुझा पालनकर्ता विसराळू नाही. ६४

رَبُّ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا فَاعْبُدْهُ وَاصْطَبِرْ
لِعِبَادَتِهٖ ؕ هَلْ تَعْلَمُ لَهٗ سَمِيًّا ۝٦٥

आकाशांचा आणि पृथ्वीचा आणि जे काही त्यांचे दर्म्यान आहे, सर्वांचा पालनकर्ता तोच आहे. तू त्याचीच उपासना कर, आणि त्याच्या उपासनेवर दृढ जमून रहा; काय तुझ्या ज्ञानांत, त्याच्याशी समान नावाचा, त्याच्याशी टक्कर घेणारा, कोणी आणखीपण(८) आहे? ६५

وَيَقُوْلُ الْاِنْسَانُ ءَاِذَا مَا مِتُّ لَسَوْفَ اُخْرَجُ حَيًّا ۝٦٦

आणि मनुष्य म्हणतो(९) की, जेव्हा मी मरून जाईन, तर काय पुन्हा जिवंत करून काढलो जाईल?(१०) ६६

اَوَلَا يَذْكُرُ الْاِنْسَانُ اَنَّا خَلَقْنٰهُ مِنْ قَبْلُ وَلَمْ يَكُ
شَيْـًٔا ۝٦٧

काय हा मनुष्य एवढे लक्षात ठेवत नाही, की आम्ही त्याला पूर्वी निर्माण केले, वास्तविक तो काहीच नव्हता(११). ६७

فَوَرَبِّكَ لَنَحْشُرَنَّهُمْ وَالشَّيٰطِيْنَ ثُمَّ لَنُحْضِرَنَّهُمْ حَوْلَ
جَهَنَّمَ جِثِيًّا ۝٦٨

तुझ्या पालनकर्त्याची शपथ! आम्ही त्यांना आणि शैतानांना जमा करून, नरकाग्नीच्या आवती भवती गुडघे टेकून अवस्थेत हजर करू (१२) ६८

१) जणू अल्लाहच्या महावाक्यांना ऐकून, रडणे आणि नम्रतेची अशी स्थिती होऊन जाणे, आणि अल्लाहच्या महानतेमुळे त्याच्यापुढे सजद्यात पडून जाणे अल्लाहच्या सेवकांचे खास लक्षण आहे. तिलावतच्या सजद्याची सुन्नतप्रमाणे ही दुआ आहे, ‘‘सजद वज्हिया लिल्लजी खलकहु व सव्वरहु व शक्क सम्अह् व बसरहु बि हव्लिही व कुव्वतिही’’ (अबुदाऊद, तिर्मिझी, निसाई) काही रिवायतीमध्ये वाढ आहे, ‘‘फतबारकल्लाहु अहसनुल खालिकीन’’ (औन अुल मआबूद)

२) ईनाम मिळालेल्या अल्लाहच्या सेवकांची चर्चा केल्यानंतर, त्या लोकांचा उल्लेख करण्यात येत आहे, जे यांच्या उलट, अल्लाहच्या आदेशांकडून सुस्ती आणि त्यांच्याकडून तोंड फिरवणारे आहेत. नमाजीला घालविण्याने अभिप्रेत, एक तर संपूर्ण नमाज पढणे सोडून देणे आहे, जे कुफ्र आहे. किंवा तिच्या वेळेला घालविणे आहे. म्हणजे वेळेवर नमाज न पढणे, जेव्हा मनांत आले नमाज पढून घेतली; किंवा काही कारणाशिवाय, एकत्रित करून पढणे, किंवा कधी दोन, कधी चार, कधी एक, आणि कधी पांच नमाजी. हे पण सर्व प्रकार नमाजीला घालविण्याचे आहेत. असे करणारा सक्त गुन्हेगार आणि महावाक्यांत वर्णन केलेल्या शिक्षा देण्याच्या धमकीला पात्र होऊं शकतो. 'गय्यन' चा अर्थ बर्बादी, वाईट परिणामाचा आहे. किंवा जहन्नमच्या एका दरीचे नाव आहे.

३) म्हणजे जो पश्चात्ताप व्यक्त करून, नमाजीला तर्क करण्याला, आणि कामवासनेच्या मागे पडण्याला, सोडून देईन; आणि ईमान आणि चांगल्या कामांच्या तगाद्यांची काळजी घेईल; तर असे लोक चर्चित वाईट परिणामांपासून सुरक्षित आणि स्वर्गांत जाण्याला पात्र राहतील.

४) म्हणजे ही यांच्या ईमान आणि यकीन (विश्वास आणि खात्री) चा पक्केपणा आहे; की त्यांनी स्वर्गाला पाहिले सुद्धा नाही; फक्त अल्लाहच्या गैबी वायद्यावरच त्याच्या प्राप्तीसाठी, ईमान आणि ईशभयाचा मार्ग अनुसरला.

५) म्हणजे देवदूतपण त्यांना चोहोबाजूने सलाम करतील. आणि स्वर्गवाले पण आपसात एक दुसऱ्याला भरपूर सलाम करीत राहतील.

६) इमाम अहमदने याच्या भाष्यांत म्हटले आहे, की स्वर्गांत रात्र आणि दिवस राहणार नाहीत. फक्त उजेडच उजेड आणि प्रकाशच प्रकाश राहील. हदीस मध्ये आहे, स्वर्गांत प्रवेश करणाऱ्या पहिल्या गटाचे चेहरे, चौदाव्या रात्रीच्या चंद्रासारखे असतील. त्यांना तेथे थुंक येणार नाही तसेच नाक येणे व लघवी संडास होणार नाही. त्यांची भांडी आणि फण्या सोन्याच्या असतील. ते सुगंधित लाकडेला जाळून स्वास घेतील त्यांचा घाम कस्तुरीप्रमाणे असेल. प्रत्येक स्वर्गवाश्यांच्या दोन पत्न्या असतील. त्यांच्या घोटा आणि गुडघ्यांच्या आतील भागातील मज्जा, त्यांच्या मांसाच्या मागून दिसेल, त्यांच्या रूप सौंदर्यामुळे त्यांच्या आपसांतील द्वेष आणि मतभेद असणार नाही. त्यांची मने, एका मनासारखी असतील. सकाळ सांज अल्लाहचे पावित्र्य वर्णन करतील. (स.बुखारी स.मुस्लिम)

७) नबी ﷺ नी एकदां, जिब्रईल عليه السلام शी जास्त आणि लवकर लवकर भेटीची इच्छा व्यक्त केली. ज्यावर हे महावाक्य उतरले. (स.बुखारी तफसीर सू.मर्यम)

८) म्हणजे जेव्हा त्याच्यासारखा कोणी नाही, तर उपासनापण कोणाची दुसऱ्या योग्य नाही.

९) मनुष्याने अभिप्रेत येथे काफिर, वर्गवारी म्हणून आहे. जे कयामत घडण्याला आणि मृत्यूनंतर पुन्हा उठण्याला, मान्य करीत नाही.

१०) आश्चर्य व्यक्त करणे, नाकारण्यासाठी आहे. म्हणजे मी जीर्ण होऊन आणि मातीत मिसळून जाईन; तर मला दुसऱ्यांदा कशाप्रकारे अस्तित्व देण्यांत येईल ? म्हणजे असे शक्य नाही.

११) अल्लाहतआलाने उत्तर दिले, जेव्हा पहिल्या वेळेला आम्ही, नमुन्याशिवाय, माणसाला निर्माण करून टाकले; तर दुसऱ्यांदा निर्माण करणे, आमच्यासाठी का कठीण व्हावे ? पहिल्या प्रथम निर्माण करणे कठीण आहे का दुसऱ्यांदा त्याला निर्माण करणे ? मनुष्य किती नादान, आणि स्वत:ला विसरून जाणारा आहे? याच स्वत:ला विसरण्यामुळे, त्याला अल्लाहला विसरणारा बनवून टाकले.

१२) 'जिस्सीन' गुडघ्यांवर पडणाऱ्यांना म्हणतात. ही स्थिती आहे. म्हणजे आम्ही दुसऱ्यांदा त्यांनाच नाही, किंबहुना त्या शैतानांना सुद्धा जिवंत करू, ज्यांनी यांना मार्गभ्रष्ट केले किंवा ज्यांची हे उपासना करीत होते. मग आम्ही त्यांना या स्थितीत जहन्नमच्या अवती भवती गोळा करू की, महशरच्या भयानक स्थिती आणि कर्मांच्या हिशेबाच्या भीतीने, गुडघे टेकून बसलेले असतील. हदीसे कुदुसीमध्ये आहे. अल्लाहतआला फर्मावितात, ''आदमचा मुलगा मला खोटे ठरवितो; वास्तविक हे त्याला योग्य नाही. आदमचा मुलगा मला इजा पोहचवितो; वास्तविक हे त्याला शोभत नाही. त्याचे मला खोटे ठरविणे तर हे आहे की, तो माझ्या बाबतीत म्हणतो, अल्लाह मला अशा प्रकारे दुसऱ्यांदा जिवंत करणार नाही; ज्याप्रमाणे मला त्याने पहिल्यावेळी निर्माण केले. वास्तविक माझ्याकरीता पहिल्यावेळा निर्माण करणे, दुसऱ्या वेळेच्या निर्माण करण्यापेक्षा, जास्त सोपे नाही. (म्हणजे कठीण जर आहे, तर पहिल्या वेळी निर्माण करणे आहे. न की दुसऱ्या वेळी) आणि त्याचे मला त्रास देणे हे आहे, की, तो म्हणतो मला संतती आहे. वास्तविक मी एक आहे; निरपेक्ष आहे; न मी कोणाला जन्म दिले, न स्वत: मी कोणापासून जन्मला: आणि माझा तोडीचा कोणी आहे.'' (स.बुखारी)

ثُمَّ لَنَنْزِعَنَّ مِنْ كُلِّ شِيْعَةٍ اَيُّهُمْ اَشَدُّ عَلَى الرَّحْمٰنِ عِتِيًّا ﴿٦٩﴾

**आम्ही मग प्रत्येक समूहांतून, त्यांना वेगळे काढून उभें करू, जे अल्लाह परम दयाळूशी फारच अकडून अकडून फिरत असतील[१] ६९**

ثُمَّ لَنَحْنُ اَعْلَمُ بِالَّذِيْنَ هُمْ اَوْلٰى بِهَا صِلِيًّا ﴿٧٠﴾

**मग, आम्ही त्यांना पण फार चांगल्या प्रकारे जाणतो, जे नरकाग्नीमध्ये प्रवेश करण्याला जास्त लायक आहेत[२] ७०**

وَاِنْ مِّنْكُمْ اِلَّا وَارِدُهَا ۚ كَانَ عَلٰى رَبِّكَ حَتْمًا مَّقْضِيًّا ﴿٧١﴾

**आणि तुमच्यातून तेथे प्रत्येक अवश्य त्याच्या जवळून जाणार आहे. ही तुझ्या पालनकर्त्याने नक्की केलेली गोष्ट आहे. ७१**

ثُمَّ نُنَجِّى الَّذِيْنَ اتَّقَوْا وَّنَذَرُ الظّٰلِمِيْنَ فِيْهَا جِثِيًّا ﴿٧٢﴾

**मग आम्ही, जे लोक आम्हास भित होते. त्यांना वांचवून घेऊ आणि आज्ञाभंजकास आम्ही, याच्यांतच, गुडघे टेकलेल्या अवस्थेत, सोडून देऊ[३] ७२**

وَاِذَا تُتْلٰى عَلَيْهِمْ اٰيٰتُنَا بَيِّنٰتٍ قَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لِلَّذِيْنَ اٰمَنُوْٓا ۙ اَىُّ الْفَرِيْقَيْنِ خَيْرٌ مَّقَامًا وَّاَحْسَنُ نَدِيًّا ﴿٧٣﴾

**आणि जेव्हा याच्यासमोर आमची तेजपुंज महावाक्ये, वाचली जातात, तेव्हा काफिर मुसलमानांना म्हणतात, सांगा! आमच्या आणि तुमच्या दोन्ही जमातीमधून, कोणाची प्रतिष्ठा जास्त आहे? आणि कोणाच्या सभा शानदार आहेत[४]? ७३**

وَكَمْ اَهْلَكْنَا قَبْلَهُمْ مِّنْ قَرْنٍ هُمْ اَحْسَنُ اَثَاثًا وَّرِءْيًا ﴿٧٤﴾

**आणि आम्ही तर यांच्यापूर्वी कित्येक समूहांना नष्ट करून चुकलो आहोत. जे सामान आणि सरंजामात (म्हणजे मालमत्तेत) आणि बाह्य देखाव्यात[५], यांच्यापेक्षा वरचढ होते. ७४**

१) 'ईतिय्या' याचा अर्थ आहे फार शिरजोर आणि बंडखोर. अर्थ हा आहे की, प्रत्येक मार्गभ्रष्ट पंथाचे मोठेमोठे शिरजोर, आणि पुढाऱ्यांना आम्ही वेगळे करून घेऊ. आणि त्यांना एकत्रित करून, जहन्नममध्ये फेकून देऊ; कारण की हे पुढारी, दुसऱ्या नर्कवासियांच्या मुकाबल्यात शिक्षा आणि दंडाला जास्त पात्र आहेत; जसे की, पुढील महावाक्यात आहे.

२) 'सिलीय्या' म्हणजे नरकाग्नीमध्ये प्रवेश करणे आणि त्यात जळण्याला कोण जास्त पात्र आहेत, आम्ही त्यांना फार चांगल्या प्रकारे जाणतो.

३) याचे भाष्य, सहीह हदीसमध्ये याप्रमाणे सांगण्यात आले आहे की, नरकाग्नीच्यावर पुल बनविण्यांत येईल; ज्याच्यातून प्रत्येक ईमानवाल्याला आणि काफिराला पार पडावे लागेल. ईमानवाले तर आपल्या आपल्या कर्मांप्रमाणे, लवकर किंवा उशीरा पार पडून जातील, काही तर पापणी लवण्या एवढ्या काळात, काही वीज आणि हवे सारखे, काही पक्ष्यांप्रमाणे, आणि काही उत्कृष्ट घोड्या आणि दुसऱ्या स्वाऱ्यांसारखे पार होऊन जातील. अशाप्रकारे काही बिलकुल ठाक ठीक, काही जखमी, पण पुल पार करून घेतील. काही नरकाग्नीत पडतील, ज्यांना शिफारसी मार्फत, काढून घेण्यांत येईल. परंतु काफिर त्या पुलाला पार करण्यांत यशस्वी होणार नाहीत. आणि सर्व नरकाग्नीत जाऊन पडतील. याचे समर्थन या हदीसने पण होते, जिच्यांत येते की, ''ज्याची तीन मुले वयांत येण्यापूर्वी, मृत्यू पावलेत, त्याला आग स्पर्श करणार नाही. परंतु फक्त शपथ पूर्ण करण्यापुरती.'' (स.बुखारी किताबुल जनाएज आणि स.मुस्लिम किताबुल बिर्र.) ही शपथ तीच आहे. जिला या महावाक्यात 'हतमम मकजिय्या' (एकदम नक्की केलेला हुकूम) म्हणण्यांत आले आहे. म्हणजे याचे नरकाग्नीत जाणे म्हणजे फक्त पुलावरून पसार होण्याच्या मर्यादेपर्यंतच असेल. (खुलाशा करीता पहावे इब्ने कसीर आणि अयसरूत तफासीर)

४) म्हणजे कुरआनाने दिलेल्या आमंत्रणाची तुलना मक्केचे काफिर, मुसलमानांतील फकीर, आणि कुरैशचे श्रीमंत, आणि त्यांच्या सभा आणि घरांच्या बाह्य देखाव्याशी करीत असत. की मुसलमानांमध्ये अम्मा, बिलाल, सुहैब, सारखे गरीब लोक आहेत. त्यांचे सलाहव मशविराचे ठिकाण, अरकमचे घर आहे. जेव्हा की काफिरांमध्ये, अबुजहल, नजर बिन हारिस, उतबा, शैबा, वगैरे सारखे श्रीमंत, आणि त्यांची आलीशान घरे आहेत. त्यांची एकत्र जमण्याची जागा (दारूल नदवा) फारच उत्कृष्ट आहे.

५) अल्लाहतआलाने फर्माविले, या ऐहिक वस्तू अशा नाहीत की, याच्यावर गर्व आणि अहंकार केला जावा. किंवा त्यांना पाहून सत्य आणि असत्याचा निर्णय केला जावा. या वस्तूतर तुमच्यापेक्षा जास्त पूर्वीच्या उम्मतींकडे (लोकसमूह) होत्या. परंतु सत्त्याला नाकारण्याच्या प्रयत्नांमुळे त्यांना नष्ट करून टाकण्यांत आले. जगांतील ही संपत्ती आणि साधने त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वाचवू शकली नाहीत.

قُلْ مَنْ كَانَ فِي الضَّلٰلَةِ فَلْيَمْدُدْ لَهُ الرَّحْمٰنُ مَدًّا ۚ حَتّٰى إِذَا رَأَوْا مَا يُوعَدُونَ إِمَّا الْعَذَابَ وَإِمَّا السَّاعَةَ ۖ فَسَيَعْلَمُونَ مَنْ هُوَ شَرٌّ مَّكَانًا وَّأَضْعَفُ جُنْدًا ﴿٧٥﴾

**आपण सांगून टाका की, जो चुकीच्या मार्गात असतो, अल्लाह रहमान त्याला ढिलच ढिल देत असतो; येथ पावेतो की, त्याने या गोष्टींना पाहून घ्यावे, ज्यांचा वायदा केला जात आहे, म्हणजे शिक्षा किंवा कयामतला; त्यावेळी त्यांना अगदी योग्य प्रकारे, ठाऊक होऊन जाईल की, कोण वाईट मर्तब्यावाला आणि कोणाचा जथ्था दुर्बल[१] आहे. ७५**

وَيَزِيدُ اللّٰهُ الَّذِينَ اهْتَدَوْا هُدًى ۗ وَالْبٰقِيٰتُ الصّٰلِحٰتُ خَيْرٌ عِنْدَ رَبِّكَ ثَوَابًا وَّخَيْرٌ مَّرَدًّا ﴿٧٦﴾

**आणि जे लोक सन्मार्गावर आहे, अल्लाहतआला त्यांना सन्मार्गाची बुद्धी देतो[२]; आणि चिरस्थायी अशी सुकृत्ये, तुझ्या पालनकर्त्या समिप, पुण्याच्या दृष्टीने आणि परिणामाच्या दृष्टीने, फारच उत्कृष्ट आहेत[३] ७६**

أَفَرَءَيْتَ الَّذِي كَفَرَ بِاٰيٰتِنَا وَقَالَ لَأُوتَيَنَّ مَالًا وَّوَلَدًا ﴿٧٧﴾

**काय तू त्याला पाहिलेस, ज्याने आमच्या निशाण्यांना नाकारले, आणि म्हटले की मला तर संपत्ती आणि संतती तर अवश्य दिली जाईल; ७७**

أَطَّلَعَ الْغَيْبَ أَمِ اتَّخَذَ عِنْدَ الرَّحْمٰنِ عَهْدًا ﴿٧٨﴾

**काय तो अदृष्टाचा ज्ञाता आहे? किंवा (त्याने) अल्लाहकडून काही वचन घेऊन चुकला आहे? ७८**

كَلَّا ۚ سَنَكْتُبُ مَا يَقُولُ وَنَمُدُّ لَهُ مِنَ الْعَذَابِ مَدًّا ﴿٧٩﴾

**मुळीच नाही! हा जे काही सांगत आहे, आम्ही त्याला अवश्य लिहून घेऊ; आणि त्याच्यासाठी शिक्षा वाढवीत चालले जाऊ ७९**

وَّنَرِثُهُ مَا يَقُولُ وَيَأْتِينَا فَرْدًا ﴿٨٠﴾

**आणि हा, ज्या वस्तुंचे सांगत आहे, त्यांना आम्ही, त्याच्यानंतर घेऊन टाकू आणि हा तर बिलकुल एकटाच, आमच्या समोर हजर[४] होईल. ८०**

وَاتَّخَذُوا مِنْ دُونِ اللّٰهِ اٰلِهَةً لِّيَكُونُوا لَهُمْ عِزًّا ﴿٨١﴾

**आणि त्यांनी अल्लाहशिवाय दुसरे उपास्य बनवून ठेवले आहेत; की त्यांच्यासाठी प्रतिष्ठेला कारणीभूत व्हावेत. ८१**

१) याशिवाय या वस्तू, मार्गभ्रष्ट आणि काफिरांना ढिल देण्यासाठी, सुद्धा देण्यात येतात. म्हणून ही काही कसोटी नाही. मूळ चांगल्या वाईटाचा पत्ता तर त्यावेळी लागेल, जेव्हा कर्म करण्याची संधी समाप्त होऊन जाईल; आणि अल्लाहची शिक्षा त्यांना येऊन घेरेल; किंवा कयामत येऊन ठेपेल. परंतु त्या वेळचे ज्ञान, काही कामा येणार नाही. कारण की तेथे याची काहीही भरपाई होणार नाही.

२) यात आणखी एका तत्त्वाचा उल्लेख आहे की, ज्याप्रमाणे कुरआनाने, ज्यांच्या मनांत कुफ्र आणि शिर्कचा आणि आडमार्गी भटकण्याचा रोग आहे; त्यांच्या कठोरतेत आणि गुमराहीत आणखी वाढ होऊन जाते. त्याचप्रमाणे ईमानवाल्यांची मने, ईमान आणि हिदायतमध्ये आणखी पक्की होऊन जातात.

३) यांत मुसलमानांतल्या फकीर लोकांना सांत्वना आहे की, काफिर आणि मुशरिकीन, ज्या संपत्ती आणि साधनांवर गर्व करतात, ते सर्व नष्ट होऊन जाणार आहे. आणि तुम्ही जी चांगली कामे करीत आहांत, ते नेहमी बाकी रहाणार आहे. ज्याचे पुण्य आणि प्रतिफळ; तुम्हांस आपल्या पालनकर्त्याच्या येथे, मिळणार आहे; आणि त्याचा उत्कृष्ट बदला आणि नफा तुम्हास परत मिळेल.

४) या महावाक्याच्या अवतरणाच्या कारणांत सांगण्यात आले आहे, की, हजरत अमरू बिन आस ﷺ चा बाप आस बिन वायल, जो इस्लामच्या कट्टर शत्रूंमध्ये होता, त्याच्यावर ह.खब्बाब बिन अरत चे कर्ज होते, जे लोहार काम करीत असत ह.खब्बाब ﷺ नी त्याच्याजवळ आपल्या रकमेची मागणी केली. तेव्हा तो म्हणाला की, जो पर्यंत तू मुहम्मद ﷺ ला नाकारणार नाही, मी तुला तुझी रक्कम देणार नाही. ते म्हणाले की, हे काम जर तू मरून दुसऱ्यांदा जिवंत होऊन जाशील, तरी सुद्धा मी करणार नाही. तो म्हणाला बरे तर मग असेच सही! जेव्हा मला मेल्यानंतर, दुसऱ्यांदा उठवून उभे केले जाईल, आणि तेथे सुद्धा मला, संपत्ती आणि संतती देण्यांत येईल, तर तेथे ही रक्कम मी अदा करून देईन. (स.बुखारी स.मुस्लिम) अल्लाहतआलाने फर्माविले की, हा जो दावा करीत आहे, काय याच्याजवळ अदृष्टाचे ज्ञान आहे? की त्याच्याजवळ तेथे ही संपत्ती आणि संतती असेल? की काय अल्लाहशी त्याने कोणी करार केला आहे? असे मुळीच नाही! ही फक्त टिंगल, आणि अल्लाहच्या महावाक्यांची थट्टा आणि टर उडविणे आहे. हा ज्या संपत्ती आणि संततीचा उल्लेख करीत आहे, त्याचे वारीस तर आम्ही आहोत. म्हणजे मेल्याबरोबरच, त्याचा यांच्याशी संबंध संपून जाईल, आणि आमच्या समक्ष तो एकटा येईल; त्याचे बरोबर संपत्ती असणार नाही आणि संतती असणार नाही, तसेच न कोणी जथ्था. फक्त शिक्षा होईल, जी त्याच्या करीता आणि त्याच्या सारख्या दुसऱ्या लोकांसाठी, आम्ही वाढवितच जाऊ.

كَلَّا ؕ سَيَكْفُرُوْنَ بِعِبَادَتِهِمْ وَيَكُوْنُوْنَ عَلَيْهِمْ ضِدًّا ﴿٨٢﴾

परंतु असे कधीच होणार नाही; ते तर त्यांच्या पुजेला नाकारणारे होऊन जातील; आणि उलट, त्यांचे शत्रू[१] होऊन जातील. (८२)

اَلَمْ تَرَ اَنَّآ اَرْسَلْنَا الشَّيٰطِيْنَ عَلَى الْكٰفِرِيْنَ تَؤُزُّهُمْ اَزًّا ﴿٨٣﴾

काय तू पाहिले नाहीस? की आम्ही काफिरांजवळ शैतानांना पाठवितो, जे त्यांना खूप (फुस देऊन) भडकवीत रहातात[२] (८३)

فَلَا تَعْجَلْ عَلَيْهِمْ ؕ اِنَّمَا نَعُدُّ لَهُمْ عَدًّا ﴿٨٤﴾

तू त्यांच्या बाबतीत घाई करू नकोस, आम्ही स्वत:च त्यांच्यासाठी मुदत मोजित आहोत[३] (८४)

يَوْمَ نَحْشُرُ الْمُتَّقِيْنَ اِلَى الرَّحْمٰنِ وَفْدًا ﴿٨٥﴾

ज्या दिवशी अल्लाहला भिणाऱ्यांना, अल्लाह परम दयाळूकडे, पाहुणे म्हणून जमा करू; (८५)

وَّنَسُوْقُ الْمُجْرِمِيْنَ اِلٰى جَهَنَّمَ وِرْدًا ﴿٨٦﴾

आणि गुन्हेगारांना, तिव्र तान्हेल्या अवस्थेत जहन्नमकडे हांकलून[४] घेऊन जाऊ (८६)

لَا يَمْلِكُوْنَ الشَّفَاعَةَ اِلَّا مَنِ اتَّخَذَ عِنْدَ الرَّحْمٰنِ عَهْدًا ﴿٨٧﴾

कोणाला शिफारशीचा अखत्यार असणार नाही, त्यांच्याशिवाय ज्यांनी अल्लाहतआलाकडून काही पक्के वचन घेऊन ठेवले आहे[५]. (८७)

وَقَالُوا اتَّخَذَ الرَّحْمٰنُ وَلَدًا ﴿٨٨﴾

आणि त्यांचे म्हणणे तर हे आहे की, अल्लाह परम दयाळूने पण संतती बाळगली आहे. (८८)

لَقَدْ جِئْتُمْ شَيْـًٔا اِدًّا ﴿٨٩﴾

खचित्‌च तुम्ही फारच वाईट आणि भारी गोष्ट आणली आहे. (८९)

تَكَادُ السَّمٰوٰتُ يَتَفَطَّرْنَ مِنْهُ وَ تَنْشَقُّ الْاَرْضُ وَتَخِرُّ الْجِبَالُ هَدًّا ﴿٩٠﴾

जवळ आहे की अशा म्हणण्याने, आकाश फाटून जाईल आणि धरती दुभंगून जाईल, आणि पर्वत चकनाचूर होऊन जातील (९०)

اَنْ دَعَوْا لِلرَّحْمٰنِ وَلَدًا ﴿٩١﴾

की ते रहमानला संतती आहे असे सिद्ध करण्यांस बसले[६] (९१)

وَمَا يَنْۢبَغِيْ لِلرَّحْمٰنِ اَنْ يَّتَّخِذَ وَلَدًا ﴿٩٢﴾

आणि हे रहमानच्या लायक नाही की त्याने संतती बाळगावी (९२)

اِنْ كُلُّ مَنْ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ اِلَّآ اٰتِي الرَّحْمٰنِ عَبْدًا ﴿٩٣﴾

आकाश आणि पृथ्वीत जे पण आहेत, सर्व च्या सर्व अल्लाहचे गुलाम बनूनच येणार आहेत[७] (९३)

لَقَدْ اَحْصٰىهُمْ وَعَدَّهُمْ عَدًّا ﴿٩٤﴾

या सर्वांना त्याने घेरून ठेवले आहे. आणि सर्वांना पूर्णपणे मोजून पण ठेवले आहे.[८] (९४)

وَكُلُّهُمْ اٰتِيْهِ يَوْمَ الْقِيٰمَةِ فَرْدًا ﴿٩٥﴾

आणि हे सर्वच्या सर्व कयामतच्या दिवशी, एकटे त्याच्याजवळ हजर होणार आहेत[९] (९५)

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ سَيَجْعَلُ لَهُمُ الرَّحْمٰنُ وُدًّا ﴿٩٦﴾

नि:संशय, ज्यांनी ईमान आणले आहे, आणि ज्यांनी चांगली कामे केली आहेत, त्यांच्यासाठी, अल्लाह परम दयाळू प्रेम निर्माण करून देईल[१०] (९६)

فَاِنَّمَا يَسَّرْنٰهُ بِلِسَانِكَ لِتُبَشِّرَ بِهِ الْمُتَّقِيْنَ وَتُنْذِرَ بِهٖ قَوْمًا لُّدًّا ﴿٩٧﴾

आम्ही या कुरआनाला तुझ्या भाषेत सोपे करून दिले आहे[११] ; की, आपण याच्या मार्फत अल्लाहला भिणाऱ्यांना खुषखबर द्यावी; आणि झगडा[१२] करणाऱ्या लोकांना भिववावे (९७)

وَكَمْ اَهْلَكْنَا قَبْلَهُمْ مِّنْ قَرْنٍ ؕ هَلْ تُحِسُّ مِنْهُمْ مِّنْ اَحَدٍ اَوْ تَسْمَعُ لَهُمْ رِكْزًا ﴿٩٨﴾

आणि आम्ही याच्यापूर्वी बरेचशे लोकसमूह नष्ट करून टाकले. काय त्यांच्यातून एकाची पण चाहुल तूला लागते, किंवा त्यांच्या आवाजाची कुण कुण तुझ्या कानांत पडते?[१३] (९८)

१) 'इज्जा' चा अर्थ आहे, उपास्यांकरीता, प्रतिष्ठेला कारणीभूत, आणि मददगार होतील; आणि 'जिद्दा' चा अर्थ आहे शत्रू, खोटे ठरविणारे, आणि त्यांच्या विरूद्ध दुसऱ्यांचे मददगार. म्हणजे हे उपास्य त्यांच्या कल्पनेच्या विरूद्ध, त्यांचे

पुरस्कर्ते होण्याच्या ऐवजी, त्यांचे शत्रू, त्यांना खोटे ठरविणारे आणि त्यांच्या विरोधांत असतील.
२) म्हणजे मार्गभ्रष्ट करतात, बहकवितात, आणि पापकर्मे करण्यासाठी ओढून नेतात.
३) आणि जेव्हा तो अवकाश संपून जाईल, तेव्हा अल्लाहच्या शिक्षेला पात्र बनून जातील. आपणांस घाई करण्याची आवश्यकता नाही.
४) 'वफ्द' अर्थ हा आहे की, त्यांना उंटावर, घोड्यांवर स्वार करून, फारच आदर सन्मानाने, स्वर्गाकडे घेऊन जाण्यात येईल. 'विरदा' चा अर्थ तान्हेले, याच्या उलट अपराध्यांना, उपाशी, तान्हेले जहन्नममध्ये हांकून देण्यात येईल.
५) करार, वचनाचा अर्थ, ईमान आणि ईशभय आहे. म्हणजे ईमान आणि ईशभयवाल्यांमधून, ज्यांना अल्लाह् शिफारस करण्याची परवानगी देईन, तेच शिफारस करतील. त्यांच्याशिवाय दुसऱ्यांना शिफारस करण्याची परवानगी दिली जाणार नाही.
६) 'इद्दा' चा अर्थ फार भयानक मामला आणि 'दाहिया' (जड वस्तू आणि मोठे संकट) चा आहे. हा विषय पहिले पण येऊन चुकला आहे. की, अल्लाहला संतती आहे, असे म्हणणे, इतका मोठा अपराध आहे की, याच्याने आकाश आणि पृथ्वी फाटू शकते. आणि पर्वत चकनाचूर होऊ शकतात.
७) जेव्हा अल्लाहचे दास, आणि त्याचे नम्र सेवक आहेत, तर मग त्याला संततीची गरज कांआहे? आणि हे त्याच्या योग्यपण नाही.
८) म्हणजे ह.आदम عليه السلام पासून ते कयामत येण्यापर्यंत, जितकीपण माणसे, आणि जिन्न आहेत, सर्वांना त्याने मोजून ठेवले आहे. सर्व त्याच्या काबूत आणि पकडीत आहेत; कोणी त्याच्यापासून लपलेला नाही आणि लपू शकणारा, राहू शकत नाही.
९) म्हणजे कोणी कोणाचा मददगार राहणार नाही. तसेच संपत्तीपण तेथे कामा येणार नाही. ''त्या दिवशी न संपत्ती नफा देईन न मुलगे.'' (सू.शुअरा-८८) प्रत्येक मनुष्याला एकटा आपला हिशेब द्यावा लागेल. आणि ज्यांच्या बाबतीत, मनुष्य हे समजतो की, हे तेथे माझे पुरस्कर्ते आणि मददगार होतील; तेथे सर्व अदृष्य होऊन जातील. कोणी कोणाच्या मदतीसाठी हजर होणार नाही.
१०) म्हणजे जगात लोकांच्या मनांत, त्याच्या पुण्याईने आणि सदाचरणाने, प्रेम निर्माण करून टाकेन. जसे की हदीसमध्ये येते, ''जेव्हा अल्लाहतआला कोण्या पुण्यवान सेवकाला आपला प्रिय बनवून घेतो. तेव्हा अल्लाह जिब्रईलला म्हणतो, अमुक सेवकाशी मी प्रेम करतो, तू पण त्याच्याशी प्रेम कर. मग जिब्रईल पण त्याच्याशी प्रेम करणे सुरू करून देतो. मग जिब्रईल आकाशांत घोषणा करतो की, अल्लाहतआला अमक्या माणसाशी प्रेम करीतो; मग सर्व आकाशवाले त्याच्याशी प्रेम करू लागतात, मग जमिनीत याच्यासाठी मान्यता आणि मानसन्मान ठेवून देण्यांत येतो'' (स.बुखारी)
११) कुरआनाला सोपे करण्याचा अर्थ, त्या भाषेत उतारणे आहे. ज्याला पैगंबर जाणत होता; म्हणजे अरबी भाषेत; मग त्याच्या विषयाचे साफ होणे, स्पष्ट आणि स्वच्छ होणे आहे.
१२) 'लुद्दा' (अलद्दचे अनेकवचन) चा अर्थ झगडणारा असा आहे. अभिप्रेत काफिर आणि मुशरिकीन आहेत.
१३) अहसासचा अर्थ आहे ज्ञानेंद्रियांमार्फत जाणून घेणे. म्हणजे काय तू त्यांना पाहू शकतो किंवा हाताने स्पर्श करू शकतोस ? विचारणे नकारार्थी आहे. म्हणजे ज्यांचे अस्तित्वच जगात नाही; की, तू त्यांना पाहू किंवा स्पर्श करू शकशील. 'रिकज्' हळू आवाजाला म्हणतात. किंवा त्यांचा हलकासा आवाज (चाहूल) च तुला कोठून ऐकू येऊ शकेल.

أٰيَاتُهَا ١٣٥ (٢٠) سُوْرَةُ طٰهٰ مَكِّيَّةٌ (٤٥) رُكُوْعَاتُهَا ٨

# (२०) सू.ताहा

महावाक्ये १३५ | रुकूअ ८

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

طٰهٰ ①

*ता-हा* ①

مَآ اَنْزَلْنَا عَلَيْكَ الْقُرْاٰنَ لِتَشْقٰٓى ②

**आम्ही हे कुरआन तुझ्यावर यासाठी नाही उतारले, की तू कष्टांत पडून जावेस[१]. ②**

اِلَّا تَذْكِرَةً لِّمَنْ يَّخْشٰى ③

**किंबहुना यापासून बोध घेण्यासाठी, जो अल्लाहला भितो. ③**

تَنْزِيْلًا مِّمَّنْ خَلَقَ الْاَرْضَ وَالسَّمٰوٰتِ الْعُلٰى ④

**याचे अवतीर्ण होणे, त्याच्याकडून आहे, ज्याने पृथ्वीला आणि (उंचच) उंच आकाशांना निर्माण केले आहे. ④**

اَلرَّحْمٰنُ عَلَى الْعَرْشِ اسْتَوٰى ⑤

**जो परम दयाळू आहे, महासिंहासनावर विराजमान आहे[२]. ⑤**

لَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا وَمَا تَحْتَ الثَّرٰى ⑥

**ज्याचे आधिपत्य, आकाश आणि पृथ्वी, आणि त्या दोघांच्या दर्म्यान जे काही आहे, आणि पाताळा खाली, प्रत्येक वस्तुंवर आहे[३]. ⑥**

وَاِنْ تَجْهَرْ بِالْقَوْلِ فَاِنَّهٗ يَعْلَمُ السِّرَّ وَاَخْفٰى ⑦

**आणि जर तू ओरडून बोलशील तर, तो प्रत्येक, गुप्त किंबहुना अधिक गुप्त गोष्टीला पण फार चांगल्याप्रकारे जाणतो[४] ⑦**

اَللّٰهُ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۭ لَهُ الْاَسْمَاۗءُ الْحُسْنٰى ⑧

**तोच अल्लाह आहे, ज्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. सुंदर सुंदर नावे त्याच्याचसाठी आहेत.[५] ⑧**

وَهَلْ اَتٰىكَ حَدِيْثُ مُوْسٰى ⑨

**आणि तुला मूसाची गोष्ट पण ठाऊक आहे? ⑨**

اِذْ رَاٰ نَارًا فَقَالَ لِاَهْلِهِ امْكُثُوْٓا اِنِّىْٓ اٰنَسْتُ نَارًا لَّعَلِّيْٓ اٰتِيْكُمْ مِّنْهَا بِقَبَسٍ اَوْ اَجِدُ عَلَى النَّارِ هُدًى ⑩

**जेव्हा की त्याने आग पाहून, आपल्या कुटुंबाला सांगितले, तुम्ही थोडा वेळ थांबून जा; मला आग दिसलेली आहे. फार शक्य आहे की, मी त्यांतून काही विस्तव, तुमच्यापाशी घेऊन येईन; किंवा आगी जवळून, मार्गाची सूचना प्राप्त करीन[६] ⑩**

فَلَمَّآ اَتٰىهَا نُوْدِيَ يٰمُوْسٰى ⑪

**जेव्हा ते तेथे पोहचले, तेव्हा आवाज[७] देण्यात आला की, हे मूसा ⑪**

اِنِّىْٓ اَنَا رَبُّكَ فَاخْلَعْ نَعْلَيْكَ ۚ اِنَّكَ بِالْوَادِ الْمُقَدَّسِ طُوًى ⑫

**खचित्च मीच तुझा पालनकर्ता आहे. तू आपले जोडे काढून टाक[८]; कारण की, पवित्र मैदान तुवा मध्ये आहेस[९] ⑫**

وَاَنَا اخْتَرْتُكَ فَاسْتَمِعْ لِمَا يُوْحٰى ⑬

**आणि मी तुला निवडून घेतले आहे;[१०] आता जे वह्य केले जाईल, त्याला नीट लक्ष देऊन ऐक. ⑬**

اِنَّنِيْٓ اَنَا اللّٰهُ لَآ اِلٰهَ اِلَّآ اَنَا فَاعْبُدْنِيْ ۙ وَاَقِمِ الصَّلٰوةَ لِذِكْرِيْ ⑭

**नि:संशय मीच अल्लाह आहे. माझ्या शिवाय उपासनेच्या योग्य आणखी कोणी नाही; बस तू माझीच उपासना कर[११]. आणि माझ्या स्मरणाकरीता नमाज कायम ठेव[१२] ⑭**

१) ह.उमर ﷺ चे इस्लाम कबूल करण्याचे निरनिराळे सबब सांगण्यात आले आहेत. काही इतिहास आणि सीरतच्या रिवायतींमध्ये, आपल्या बहीण आणि मेव्हण्याच्या घरात, सू.ताहा ऐकणे, आणि त्याच्याने प्रभावित होणे पण लिहलेले आहे. (फत्हुल कदीर)

२) याचा अर्थ हा आहे की, आम्ही कुरआनाला यासाठी उतारले नाही की तू यांच्या कुफ्रवर, त्यांच्या खेद आणि त्यांच्या ईमान न आणण्यावर, खेद्राने आपल्या स्वत:ला त्रासांत टाकून घ्यावे; आणि दु:खात पडून जावे जसे की या महावाक्यात सांगण्यात आले आहे की, ''मग जर हे लोक या गोष्टीवर ईमान आणणार नाहीत, तर काय आपण यांच्यामागे आपल्या जीवाचा घात करुन घेणार. (सू.कहफ-६)परंतु आम्ही तर कुरआनाला बोध, आणि आठवण करून देण्यासाठी उतारले आहे. कारण की प्रत्येक माणसाच्या मनांतराच्या आंत, एकेश्वरवादाची जी भावना लपलेली आहे; स्पष्ट आणि दृगोच्चर होऊन जावी.

३) कुठल्याही मर्यादाबंदीशिवाय आणि परिस्थिती वर्णन केल्याशिवाय, ज्याप्रमाणे की त्याच्या शानच्या योग्य आहे. म्हणजे अल्लाहतआला अर्ष– महासिंहासनावर विराजमान आहे. परंतु कशा तऱ्हेने आणि कसे ? ही अवस्था कोणाला ठाऊक नाही.

४) 'सरा' चा अर्थ आहे पृथ्वीचा सर्वांत खालचा भाग.

५) म्हणजे अल्लाहचे स्मरण किंवा त्याच्याशी दुआ, मोठ्या आवाजाने करण्याची आवश्यकता नाही. यासाठी की तो गुप्त आणि गुप्ताहून गुप्त गोष्टीला पण जाणतो. किंवा 'अखफा' चा अर्थ आहे की अल्लाह तर त्या गोष्टींना पण जाणतो, ज्यांना त्याने प्रारब्धात लिहून दिले. आणि आतांपर्यंत, लोकांपासून याला गुप्त ठेवले आहे. म्हणजे कयामतपर्यंत घडणाऱ्या घटनांचे त्याला ज्ञान आहे.

६) म्हणजे उपास्य पण तोंच आहे, ज्याच्यात चर्चित वैशिष्टये आहेत. आणि सुंदर नावे पण त्याचीच आहेत, ज्याच्याने त्याला बोलाविले जाते. त्याच्या शिवाय कोणी उपास्य नाही; आणि न त्याच्यासारखी सुंदर नावे कोणाची आहेत. बस्, याचीच खरी ओळख प्राप्त करून, त्यालाच भ्याले जावे. त्याच्यावरच प्रेम केले जावे. त्याच्या वरच ईमान आणले जावे आणि त्याचेच आज्ञापालन केले जावे. कारण की मनुष्य जेव्हा त्याच्यासमक्ष परत जाईल तर तेथे लज्जित न व्हावा. किंबहुना त्याच्या दये आणि क्षमेने, आनंदित, आणि त्याच्या प्रसन्नतेने भाग्यवंत व्हावा.

७) ही त्यावेळची गोष्ट आहे, जेव्हा ह.मूसा عليه السلام मदयनहून आपल्या पत्नीबरोबर (जी एका कथनानुसार, ह.शोएब عليه السلام ची मुलगी होती.) आपल्या आईकडे परत जात होती. काळोखी रात्र होती. आणि रस्तापण ओळखीचा नव्हता. आणि काही भाष्यकारांच्या म्हणण्याप्रमाणे, पत्नीच्या प्रसुतीचा काळ फारच जवळ होता. आणि त्यांना उबेची आवश्यकता होती. किंवा थंडीमुळे त्यांना उष्णतेची आवश्यकता वाटली. इतक्यात लांबून त्यांना अग्नीच्या ज्वाला, उंच होत असतांना दिसल्या. घरवाल्यांना म्हणजे पत्नी (किंवा काही म्हणतात नोकर आणि मुलपण होते म्हणून अनेकवचनी शब्द वापरला) सांगितले की, तुम्ही येथे थांबा ! कदाचित मी आगीतून काही विस्तव घेऊन येईन किंवा, तेथून रस्त्याची माहितीच मिळून जाईल.

८) मूसा عليه السلام जेव्हा आगीच्या जागी पोहचले, तेथे एका झाडांतून (जसे सू.कसस आ.३० मध्ये खुलासा आहे.) आवाज आला.

९) जोडे उतारण्याचा हुकूम यासाठी देण्यात आला की यात नम्रतेचे प्रदर्शन आणि श्रेष्ठत्व आणि इज्जत करणे याची बाजू आहे. काही म्हणतात की, ते जोडे अशा गाढवाच्या चामडीपासून बनविले होते, जी योग्यरित्या तयार केली नव्हती. कारण की, जनावराची चामडी, रंगविल्यानंतरच पवित्र होते. परंतु हे म्हणणे विचार करण्यासारखे आहे. रंगविल्याशिवाय जोडे कसे काय बनू शकतात? किंवा त्या दरीचे पावित्र्य याचे कारण होते, जसे की कुरआनाच्या शब्दाने हे स्पष्ट होते. तथापि याच्या दोन बाजू आहेत. हा हुकूम दरीच्या पवित्रतेसाठी होता, किंवा यासाठी होता की दरीच्या पावित्र्याचे परिणाम, उघडे पाय असण्याच्या स्वरूपांत, मूसा عليه السلام मध्ये जास्त भिनूंशकावे. वल्लाह अआलम! तुवा दरीचे नांव आहे.

१०) म्हणजे पैगंबरीसाठी आणि आमच्या बरोबर संभाषण करण्यासाठी. आणि या दोन्ही प्रतिष्ठेच्या गोष्टी, या वेळी तुझ्याशिवाय कोणाला प्राप्त नाहीत.

११) म्हणजे धर्मशास्त्रांमध्ये, पहिला आणि सर्वांत महत्त्वाचा हुकूम आहे ज्याचे प्रत्येक मनुष्यांवर बंधन आहे. याशिवाय जेव्हा उपास्यात्वाचा पात्र पण तोच आहे. म्हणून उपासना पण त्याचाच हक्क आहे.

१२) उपासनेनंतर नमाजीचा विशेष हुकूम दिला. वास्तविक उपासनेमध्ये नमाज पण शामील होती; कारण की, त्याचे ते महत्त्व पण स्पष्ट होऊन जावे, जसे की, याचे (म्हणजे उपासनेचे) आहे. 'लिजिकरी' चा एक अर्थ हा आहे की, तू मला आठवत रहावे, यासाठी आठवण करण्याची पद्धत उपासना आहे. आणि उपासनांमध्ये नमाजीला विशेष महत्त्व आणि श्रेष्ठत्व प्राप्त आहे. दुसरा भावार्थ हा आहे की, जेव्हा पण मी तुला आठवून जाईन, तेव्हा नमाज पढ. म्हणजे कोऱ्या वेळी, सुस्ती, गुंगी किंवा झोप लागली अशा स्थितीतून बाहेर पडतांच, आणि माझी आठवण होतांच, नमाज पढ. ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''जो नमाज पढल्याशिवाय झोपून जाईल, किंवा विसरून जाईल, तर त्याचे प्रायश्चित हेच आहे की, जेव्हाही त्याला आठवण येईल, त्याने नमाज पढून घ्यावी.'' (स.बुखारी व स.मुस्लिम)

إِنَّ السَّاعَةَ اٰتِيَةٌ أَكَادُ أُخْفِيهَا لِتُجْزٰى كُلُّ نَفْسٍۢ بِمَا تَسْعٰى ﴿١٥﴾

कयामत खचित्‌च येणार आहे, जिला मी गुप्त ठेवू इच्छितो, कारण की प्रत्येक माणसाला तो बदला दिला जावा, जो त्याने प्रयत्न केला असेल ⑮

فَلَا يَصُدَّنَّكَ عَنْهَا مَنْ لَّا يُؤْمِنُ بِهَا وَاتَّبَعَ هَوٰىهُ فَتَرْدٰى ﴿١٦﴾

बस! आता याच्या खात्रीने, तुला कोणी अशा मनुष्याने मना करू नये, जो त्या (अल्लाह) वर ईमान ठेवत नसेल. आणि आपल्या मनेच्छेच्या मागे लागलेला असेल, नाही तर तू गारत होऊन जाशील.(१) ⑯

وَمَا تِلْكَ بِيَمِينِكَ يٰمُوسٰى ﴿١٧﴾

आणि हे मूसा! तुझ्या या उजव्या हातात काय आहे? ⑰

قَالَ هِيَ عَصَايَ ۚ أَتَوَكَّؤُا عَلَيْهَا وَأَهُشُّ بِهَا عَلٰى غَنَمِي وَلِيَ فِيهَا مَاٰرِبُ أُخْرٰى ﴿١٨﴾

त्याने उत्तर दिले की ही माझी लाठी आहे. जिच्यावर मी टेक लावतो; आणि जिच्याने मी आपल्या बकऱ्यांसाठी पाने झाडून घेतो; आणखीही हिच्यांत माझ्यासाठी बरेचसे फायदे आहेत ⑱

قَالَ أَلْقِهَا يٰمُوسٰى ﴿١٩﴾

फर्माविले हे मूसा! हिला हातांतून खाली टाकून दे. ⑲

فَأَلْقٰىهَا فَإِذَا هِيَ حَيَّةٌ تَسْعٰى ﴿٢٠﴾

टाकताच ती साप बनून धावू लागली ⑳

قَالَ خُذْهَا وَلَا تَخَفْ ٚ سَنُعِيدُهَا سِيرَتَهَا الْأُولٰى ﴿٢١﴾

सांगितले, निर्भय होऊन, तिला धरून घे. आम्ही तिला, त्याच पहिल्या स्वरूपांत, दुसऱ्यांदा आणून देऊ(२) ㉑

وَاضْمُمْ يَدَكَ إِلٰى جَنَاحِكَ تَخْرُجْ بَيْضَاءَ مِنْ غَيْرِ سُوءٍ اٰيَةً أُخْرٰى ﴿٢٢﴾

आणि आपला हाथ आपल्या बगलेत टाकून घे, तर तो पांढरा शुभ्र चमकता होऊन निघेल; परंतु कुठल्याही दोष आणि (आजारा)शिवाय.(३) हा दुसरा चमत्कार आहे. ㉒

لِنُرِيَكَ مِنْ اٰيٰتِنَا الْكُبْرٰى ﴿٢٣﴾

हे यासाठी की आम्ही तुला, आपल्या मोठमोठ्या निशाण्या दाखवू इच्छितो. ㉓

ع ١/٤٤/١٠ اِذْهَبْ إِلٰى فِرْعَوْنَ إِنَّهُ طَغٰى ﴿٢٤﴾

आता तू फिरऔनाकडे जा. त्याने मोठी दंडेली माजवून ठेवली आहे.(४) ㉔ ع १/२४/१०

قَالَ رَبِّ اشْرَحْ لِي صَدْرِي ﴿٢٥﴾

मूसाने म्हटले हे माझ्या पालनकर्त्या! माझी छाती माझ्यासाठी उघडून दे. ㉕

وَيَسِّرْ لِي أَمْرِي ﴿٢٦﴾

आणि माझे काम, माझ्यासाठी सोपे करून दे. ㉖

وَاحْلُلْ عُقْدَةً مِّنْ لِّسَانِي ﴿٢٧﴾

आणि माझ्या जिभेतील गांठ पण उलगडून दे ㉗

يَفْقَهُوا قَوْلِي ﴿٢٨﴾

कारण की लोकांनी माझी गोष्ट चांगल्याप्रकारे समजू शकावी. ㉘

१) यासाठी की परलोकावर भरोसा ठेवणे किंवा त्याचा उल्लेख किंवा चिंतनापासून विमुख होणे, दोन्हीही गोष्टी गारत करण्याला कारणीभूत आहेत.

२) हा ह.मूसा (अलैहिस्सलाम) ला चमत्कार प्रदान केला गेला. जो 'असा-ए-मूसा' च्या नावाने प्रसिद्ध आहे.

३) कुठल्याही दोष आणि आजाराशिवायचा अर्थ, हा आहे की, हात अशाप्रकारे पांढरा शुभ्र आणि चमकदार होऊन निघणे, कोण्या आजारामुळे नाही, जशी की, श्वेतकोडाच्या रोग्याची चामडी, पांढरी होऊन जाते. किंबहुना हा दुसरा चमत्कार आहे. जो आम्ही तुला देत आहोत. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी, या दोन्ही चमत्कारांचा उल्लेख करून फर्माविले, ''बस ही दोन प्रमाणे आहेत, तुझ्या पालनकर्त्याकडून, फिरऔन आणि त्याच्या सरदारांसाठी.'' (सू.कसस-३२)

४) फिरऔनचा उल्लेख यासाठी केला की, ह.मूसा (अलैहिस्सलाम) चा समाज, बनी इस्राईलला त्याने गुलाम बनवून ठेवले होते. आणि त्याच्यावर तऱ्हेतऱ्हेचे जुलूम, चालू ठेवीत असे. याशिवाय त्याची दंडेली आणि अहंकार पण फार वाढून गेला होता. येथ पावेतो की तो दावा करू लागला होता, ''मी तुमचा महान पालनकर्ता आहे.''

| | |
|---|---|
| आणि माझा वजीर माझ्या कुटुंबांतून करून दे ㉙ | وَاجۡعَلۡ لِّیۡ وَزِیۡرًا مِّنۡ اَهۡلِیۡ ﴿۲۹﴾ |
| म्हणजे माझा भाऊ, हारूनला ㉚ | هٰرُوۡنَ اَخِی ﴿۳۰﴾ |
| तू, त्याच्याने माझ्या कमरेला बळकटी आण ㉛ | اشۡدُدۡ بِهٖۤ اَزۡرِیۡ ﴿۳۱﴾ |
| आणि माझ्या कामांत त्याला भागीदार कर.[१] ㉜ | وَاَشۡرِكۡهُ فِیۡۤ اَمۡرِیۡ ﴿۳۲﴾ |
| कारण की, आम्ही दोघांनी तुझी फारच पवित्रता वर्णावी ㉝ | كَیۡ نُسَبِّحَكَ كَثِیۡرًا ﴿۳۳﴾ |
| आणि तुझे अतोनात स्मरण करीत रहावे[२] ㉞ | وَّنَذۡكُرَكَ كَثِیۡرًا ﴿۳۴﴾ |
| नि:संशय तू आम्हावर फारच (कृपा) दृष्टी ठेवणारा आहेस.[३] ㉟ | اِنَّكَ كُنۡتَ بِنَا بَصِیۡرًا ﴿۳۵﴾ |
| (अल्लाहने) सांगितले हे मूसा! तुझे सर्व मागणे पूर्ण करून दिले गेले[४] ㊱ | قَالَ قَدۡ اُوۡتِیۡتَ سُؤۡلَكَ یٰمُوۡسٰی ﴿۳۶﴾ |
| आम्ही तर तुझ्यावर, एकदा आणखी पण उपकार केला आहे[५]. ㊲ | وَلَقَدۡ مَنَنَّا عَلَیۡكَ مَرَّةً اُخۡرٰۤی ﴿۳۷﴾ |
| जेव्हा की, आम्ही तुझ्या आईला, वह्य केली होती. ㊳ | اِذۡ اَوۡحَیۡنَاۤ اِلٰۤی اُمِّكَ مَا یُوۡحٰۤی ﴿۳۸﴾ |

१) असे म्हणतात की, ह.मूसा عليه السلام जेव्हा फिरऔनाच्या शाही महालांत, जोपासले जात होते, तेव्हा खजूर किंवा मोत्यांच्या ऐवजी, आगीचा विस्तव तोंडात टाकून घेतला होता. ज्यामुळे त्यांची जीभ जळून गेली; आणि तिच्यांत काही अडखळणे निर्माण होऊन गेले. जेव्हा अल्लाहतआलाने त्यांना हुकूम दिला की, फिरऔनाजवळ जाऊन, माझा संदेश पोहचवा. तेव्हा ह.मूसा عليه السلام च्या मनांत दोन गोष्टी आल्यात. एक तर तो मोठा जुलुमी आणि गर्विष्ठ बादशाह आहे. किंवा रब (पालनकर्ता) होण्यापर्यंतचा पण दावेदार आहे. दुसरे हे की, ह.मूसा عليه السلام च्या हातून, त्याच्या समाजाचा एक माणूस मारला गेला होता; ज्यामुळे मूसा عليه السلام ला, आपला जीव वांचविण्यासाठी, तेथून निघून जावे लागले होते. म्हणजे एक तर फिरऔनाची महत्ता आणि त्याचा जुलूम यांचे भय, आणि दुसरा आपल्या हातून होणाऱ्या घटनेचे भय, आणि या दाहोपेक्षांआणखी जास्त, तिसरी गोष्ट जिभेचे अडखळणे. ह.मूसा عليه السلام नी दुआ केली की, हे अल्लाह! माझी छाती उघडून दे. कारण की मी पैगंबरीचे ओझे उचलू शकेल. माझ्या कामाला सोपे करून दे. म्हणजे जी मोहिम माझ्यापुढे आहे, तिच्यांत माझी मदत कर. आणि माझ्या जिभेची गांठ उलगडून दे. यासाठी की मी, फिरऔनासमोर पूर्ण खुलाशासह तुझा संदेश, पोहचवू शकू. आणि जर आवश्यकता पडली तर आपला बचाव करू शकू. या बरोबर ही दुआ पण केली की, माझा भाऊ हारूनला (असे म्हणतात की, हे वयांत मूसापेक्षा मोठे होते.) सहाय्यक आणि मददगार म्हणून, माझा वजीर, आणि माझ्या कामांत भागीदार बनवूंन दे. 'वजीर' 'मुवाजिर' च्या अर्थांत आहे म्हणजे ओझे उचलणारा. ज्याप्रमाणे एक वजीर बादशाहचे ओझे उचलतो. आणि राज्यांच्या कामातंत्याचा सल्लागार असतो. अशाप्रकारे हारून माझा सल्लागार आणि ओझे उचलणारा साथीदार व्हावा.

२) हे दुआ करण्याचे कारण सांगितले की, अशाप्रकारे आम्ही पैगंबरीच्या प्रचाराबरोबर बरोबर, तुझे पावित्र्य वर्णन आणि तुझे स्मरणपण जास्त करू शकावे.

३) म्हणजे तुला सर्व परिस्थितीचे ज्ञान आहे. आणि लहानपणी, ज्याप्रमाणे तूंआमच्यावर उपकार केलेस, आता सुद्धां, आपल्या उपकारातून, आम्हांस वंचित् ठेवू नकोस.

४) याने ठाऊक होते की, अल्लाहतआलाने त्यांच्या जिभेच्या अडखळण्याला पण दूर करून टाकले असावे. म्हणून हे म्हणणे बरोबर नाही. की ह.मूसा عليه السلام नी पूर्ण अडखळणे दूर करण्याची दुआ केली नव्हती, म्हणून कांही बाकी राहून गेले होते. बाकी राहिले फिरऔनाचे हे म्हणणे, ''हा तर साफ बोलू पण शकत नाही.'' (सू.जुखरूफ-५२) हे त्यांच्यावर टिका, आणि मागील अवस्थेच्या अनुषंगाने आहे. (अयसरूत तफासीर)

५) दुआ मान्य केल्याच्या खुषखबरी बरोबरच, जास्त समाधान आणि हिमतीसाठी, अल्लाहतआला लहानपणाच्या या उपाकारला वर्णन करीत आहे. जेव्हा मूसा عليه السلام च्या आईने ठार करण्याच्या भीतीने, अल्लाहच्या हुकूमाने, (म्हणजे अल्लाहच्या इशाऱ्याने) त्यांना, जेव्हा ते, दूध पिणारे मूल होते, पेटीत टाकून नदीत टाकून दिले होते.

أَنِ اقْذِفِيهِ فِي التَّابُوتِ فَاقْذِفِيهِ فِي الْيَمِّ فَلْيُلْقِهِ الْيَمُّ بِالسَّاحِلِ يَأْخُذْهُ عَدُوٌّ لِّي وَعَدُوٌّ لَّهُ ۚ وَأَلْقَيْتُ عَلَيْكَ مَحَبَّةً مِّنِّي ۚ وَلِتُصْنَعَ عَلَىٰ عَيْنِي ﴿٣٩﴾

की तू याला पेटीत बंद करून, नदीत टाकून दे. मग नदी त्याला किनाऱ्यावर आणून टाकीन; आणि माझा आणि खुद्द त्याचा शत्रू, त्याला घेऊन घेईल[१]. आणि मी आपल्याकडचे खास प्रेम आणि मान्यता तुजवर टाकून दिली[२]; कारण की तुझे पालन पोषण माझ्या डोळ्यासमोर[३] केले जावे. (٣٩)

إِذْ تَمْشِي أُخْتُكَ فَتَقُولُ هَلْ أَدُلُّكُمْ عَلَىٰ مَن يَكْفُلُهُ ۖ فَرَجَعْنَاكَ إِلَىٰ أُمِّكَ كَيْ تَقَرَّ عَيْنُهَا وَلَا تَحْزَنَ ۚ وَقَتَلْتَ نَفْسًا فَنَجَّيْنَاكَ مِنَ الْغَمِّ وَفَتَنَّاكَ فُتُونًا ۚ فَلَبِثْتَ سِنِينَ فِي أَهْلِ مَدْيَنَ ثُمَّ جِئْتَ عَلَىٰ قَدَرٍ يَا مُوسَىٰ ﴿٤٠﴾

(आठवण कर) जेव्हा की तुझी बहीण चालत होती आणि सांगत होती की, जर तुम्ही म्हणाल, तर मी तिला दाखवून देऊ, जी याची जोपासना करेल[४]; या युक्तीने आम्ही तुला पुन्हा तुझ्या आईच्या जवळ पोहचून दिले की तिचे डोळे गार रहावेतआणि तिने दु:खी होऊ नये; आणि तू एका माणसाला मारून[५] टाकले होतेस, यावर पण आम्ही तुला दु:खापासून वांचवून घेतले. म्हणजे आम्ही तुला चांगल्या प्रकारे आजमाऊन[६] घेतले. मग तू कित्येक वर्षेपर्यंत 'मदयन' च्या लोकांत थांबून राहिला[७]. मग अल्लाहच्या प्रारब्धाने[८] हे मूसा! तू आलास (٤٠)

وَاصْطَنَعْتُكَ لِنَفْسِي ﴿٤١﴾

आणि मी तुला खास व्यक्तीगत, पसंत करून घेतले (٤١)

اذْهَبْ أَنتَ وَأَخُوكَ بِآيَاتِي وَلَا تَنِيَا فِي ذِكْرِي ﴿٤٢﴾

आता तू आपल्या भावासह, माझ्या निशाण्या बरोबर घेऊन, जा. आणि खबरदार! माझ्या स्मरणांत सुस्ती करू नकोस[९] (٤٢)

اذْهَبَا إِلَىٰ فِرْعَوْنَ إِنَّهُ طَغَىٰ ﴿٤٣﴾

तुम्ही दोघे फिरऔनाजवळ जा; त्याने फार दंडेली माजविली आहे (٤٣)

فَقُولَا لَهُ قَوْلًا لَّيِّنًا لَّعَلَّهُ يَتَذَكَّرُ أَوْ يَخْشَىٰ ﴿٤٤﴾

त्याला नर्मीने समजावा[१०]. की, कदाचित् तो समजून जाईल. किंवा भिऊन जाईल (٤٤)

قَالَا رَبَّنَا إِنَّنَا نَخَافُ أَن يَفْرُطَ عَلَيْنَا أَوْ أَن يَطْغَىٰ ﴿٤٥﴾

दोघांनी म्हटले हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला भीती वाटते की, फिरऔन आमच्यावर कोठे अत्याचार न करो; किंवा आपल्या शिरजोरीत (आणखी) वाढून न जावा. (٤٥)

قَالَ لَا تَخَافَا ۖ إِنَّنِي مَعَكُمَا أَسْمَعُ وَأَرَىٰ ﴿٤٦﴾

उत्तर देण्यात आले की तुम्ही आजिबात भीती बाळगू नका. मी आता तुमच्याबरोबर आहे; पहात[११] आहे आणि ऐकत आहे. (٤٦)

فَأْتِيَاهُ فَقُولَا إِنَّا رَسُولَا رَبِّكَ فَأَرْسِلْ مَعَنَا بَنِي إِسْرَائِيلَ وَلَا تُعَذِّبْهُمْ ۖ قَدْ جِئْنَاكَ بِآيَةٍ مِّن رَّبِّكَ ۖ وَالسَّلَامُ عَلَىٰ مَنِ اتَّبَعَ الْهُدَىٰ ﴿٤٧﴾

तुम्ही त्याच्याजवळ जाऊन सांगा की, आम्ही तुझ्या पालनकर्त्याचे, पैगंबर आहोत. तू आमच्याबरोबर बनी इस्राईलला पाठवून दे. त्यांच्या शिक्षा बंद कर. आम्ही तर तुझ्याजवळ, तुझ्या पालनर्त्याकडून निशाणी घेऊन आलो आहोत. आणि सलामती त्याच्याचसाठी आहे, जो सरळ मार्ग अनुसरेल[१२] (٤٧)

إِنَّا قَدْ أُوحِيَ إِلَيْنَا أَنَّ الْعَذَابَ عَلَىٰ مَن كَذَّبَ وَتَوَلَّىٰ ﴿٤٨﴾

आमच्याकडे वह्य करण्यात आले आहे की, जो खोटे ठरवेन आणि तोंड फिरवेन, त्याच्याकरिता शिक्षा आहे. (٤٨)

قَالَ فَمَن رَّبُّكُمَا يَا مُوسَىٰ ﴿٤٩﴾

फिरऔनाने विचारले की, हे मूसा! तुमच्या दोघांचा पालनकर्ता कोण आहे? (٤٩)

قَالَ رَبُّنَا الَّذِي أَعْطَىٰ كُلَّ شَيْءٍ خَلْقَهُ ثُمَّ هَدَىٰ ﴿٥٠﴾

उत्तर दिले की आमचा पालनकर्ता तो आहे ज्याने प्रत्येकाला त्याचा चेहरा मोहरा प्रदान केला, मग (सरळ) मार्ग दाखविला[१३] (٥٠)

१) अभिप्रेत फिरऔन आहे. जो अल्लाहचा पण शत्रू होता, आणि ह.मूसा. عليه السلام चा पण शत्रू होता. म्हणजे लाकडाची ती पेटी, जेव्हा तरंगत तरंगत, शाही महालाच्या किनाऱ्याला पोहचली; तेव्हा तिला बाहेर काढून पाहण्यात आले. तर तिच्यात एक तान्हे बालक होते. ज्याला फिरऔनने आपल्या पत्नीच्या इच्छेखातर, संगोपणासाठी, शाही महलांत ठेवून घेतले.

२) म्हणजे फिरऔनाच्या मनांत टाकून दिले किंवा सर्वसाधारण लोकांच्या मनांमध्ये तुझे प्रेम टाकून दिले.

३) म्हणजे माझ्या संरक्षणांत आणि देखरेखीत. म्हणून अल्लाहच्या सामर्थ्याचा आणि त्याच्या संरक्षणाची आणि देखरेखेची कमाल आणि चमत्कार पहा, की ज्या मुलासाठी, फिरऔन, बे सुमार मुलांना ठार करून चुकला होता. कारण की त्या मुलाने जिवंत राहू नये; त्याच मुलाला अल्लाहतआलाने त्याच्याच कुशीत पाळून राहिला आहे. आणि आई आपल्या मुलाला दूध पाजित आहे. परंतु याची मजुरी पण याच मूसाच्या शत्रुकडून वसूल करीत आहे. 'फ सुबहान जिल जबरूत वल मलकुत वल किबरियाअ वल अजमत'

४) हे त्या वेळी झाले, जेव्हा आईने पेटी समुद्रांत फेकून दिली; आणि आपल्या मुलीला सांगितले, जरा पाहत रहा, ही कोठे किनाऱ्याला लागते; आणि हिच्याबरोबर काय मामला होतो? जेव्हा अल्लाहच्या मर्जीने, मूसा عليه السلام फिरऔनच्या महालांत पोहचून गेले, स्तनपान करण्याचा काळ होता. म्हणून दूध पाजणाऱ्या स्त्रियांना आणि आयांना बोलविण्यात आले. परंतु मूसा عليه السلام कोणाचेही दूध पीत नव्हते. मूसा عليه السلام ची बहीण स्तब्धपणे, सर्व दृश्य पाहत होती. सरशेवटी तिने सांगितले मी तुम्हांस अशी स्त्री दाखविते, जी तुमची ही अडचण दूर करून टाकेन. त्यांनी सांगितले, ठीक आहे. म्हणून तीने आपल्या आईला, जी मूसा عليه السلام ची पण आई होती, बोलावून आणले. जेव्हा पुत्राला छातीशी लावले; तेव्हा मूसा عليه السلام नी अल्लाहच्या युक्तीने आणि इच्छेने, गटागट दूध पिणे सुरू करून दिले.

५) हा एक दुसऱ्या उपकाराचा उल्लेख आहे. जेव्हा मूसा عليه السلام कडून, नकळत एक फिरऔनीला फक्त ठोसा मारल्याने तो मरून गेला. ज्याचा उल्लेख सू.कसस मध्ये येईल.

६) 'फुतून' म्हणजे आम्ही तुला खूब आजमाविले. किंवा हे अनेकवचन आहे 'फित्ना' चे. म्हणजे आम्ही तुला कित्येक वेळा किंवा वारंवार आजमाविले किंवा कसोटीतून काढले. उदाहरणार्थ जे वर्ष मुलांना ठार करण्याचे होते, तुला जन्माला घातले, तुझ्या आईने तुला समुद्राच्या लाटांचे हवाली केले. सर्व आयांचे दूध तुझ्यासाठी हराम केले. तू फिरऔनाची दाढी धरून घेतली होती, ज्यावर त्याने तुला ठार मारण्याचा इरादा करून घेतला होता. तुझ्या हातून किब्तीचा खून होऊन गेला होता. वगैरे. या सर्व परीक्षांच्या घटनांमध्ये आम्हीच तुझी मदत आणि त्यावर उपाय करीत राहिलो.

७) म्हणजे फिरऔनीच्या न कळत झालेल्या खुनानंतर, तू येथून निघून मदयनला चालला गेलास. आणि तेथे कित्येक वर्षे राहिलास.

८) म्हणजे अशा वेळी, तू आलास, जी वेळ मी, आपल्या निर्णय, आणि प्रारब्धांत, तुझ्या बरोबर संभाषण आणि पैगंबरीसाठी लिहीली होती. किंवा कद्र ने अभिप्रेत वय आहे; म्हणजे वयाच्या या अवस्थेत आलास, जी पैगंबरीकरिता योग्य आहे. म्हणजे चाळीस वर्षांच्या वयांत.

९) याच्यांत अल्लाहकडे बोलविणाऱ्यांसाठी, मोठा धडा आहे. की, त्यांनी अल्लाहचे भरपूर स्मरण केले पाहिजे.

१०) हा गुण पण दाई लोकांसाठी फार आवश्यक आहे. कारण की सक्तीने लोक दूर जातात, आणि नम्रतेने जवळ येतात आणि प्रभावी होतात, जर ते हिदायतला कबूल करणारे असतील.

११) तुम्ही फिरऔनाला जाऊन जे सांगाल, आणि त्याच्या उत्तरात, जे तो सांगेल, ते मी ऐकत, आणि तुमच्या आणि त्याच्या वर्तणुकीला, पाहत राहील. याच्याप्रमाणे मी तुमची मदत, आणि त्याच्या चालींना अयशस्वी करीन. म्हणून त्याच्याजवळ. संकोच करण्याची काही आवश्यकता नाही.

१२) हा रहमतचा सलाम नाही. परंतु सलामती आणि शांतीकडे आमंत्रण आहे. जसे, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी, रोमचा बादशाह हिरक्ल च्या नावाने लिहलेल्या पत्रांत, लिहले होते, 'अस्लिम तस्लम' (इस्लाम कबूल कर, सलामती मध्ये राहशील.) अशाच प्रकारे पत्राच्या सुरवातीला आपण ﷺ नी ''अस्सलामु अला मनित्तबअल हुदा.'' पण लिहले होते. (इब्ने कसीर) याचा अर्थ हा आहे की, कोण्या गैर मुस्लिमला पत्र, किंवा सभेत संबोधित करावयाचे असेल, तर याच शब्दात सलाम सांगितला जावा. जो सशर्त आहे, हिदायतला अंगिकारण्याबरोबर.

१३) उदाहरणार्थ जो चेहरा मोहरा माणसाच्या स्थितीप्रमाणे योग्य होता, तो त्याला आणि जो जनावरांना योग्य होता तो जनावरांना दिला. ''मार्ग सुचविला'' चा अर्थ प्रत्येक सृष्टीला त्याच्या स्वाभाविक आवश्यकतेनुसार, रहाणे सवरणे, खाणे पिणे, आणि राहणीची पद्धत समजावून दिली. याच्याप्रमाणे प्रत्येक जीवसृष्टी, जीवनाला आवश्यक असा सामान मिळवून घेते. आणि मिळालेल्या जीवनाचे दिवस घालवते.

قَالَ فَمَا بَالُ الْقُرُوْنِ الْاُوْلٰى ﴿٥١﴾

त्याने म्हटले बरे! हे तर सांगा, की, प्राचीन काळांतील लोकांची स्थिती काय होणार आहे[१]? ५१

قَالَ عِلْمُهَا عِنْدَ رَبِّيْ فِيْ كِتٰبٍ ۚ لَا يَضِلُّ رَبِّيْ وَلَا يَنْسَى ﴿٥٢﴾

उत्तर दिले, त्यांचे ज्ञान, माझ्या पालनकर्त्याजवळ, पुस्तकांत लिहिलेले आहे.माझा पालनकर्ता चूक करीत नाही; तसेच तो विसरत पण नाही[२]. ५२

الَّذِيْ جَعَلَ لَكُمُ الْاَرْضَ مَهْدًا وَّسَلَكَ لَكُمْ فِيْهَا سُبُلًا وَّاَنْزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً ۚ فَاَخْرَجْنَا بِهٖٓ اَزْوَاجًا مِّنْ نَّبَاتٍ شَتّٰى ﴿٥٣﴾

त्याने जमिनीला तुमच्यासाठी बिछाईत बनवले, आणि हिच्यांत तुमच्या चालण्यासाठी रस्ते बनविलेत; आणि आकाशांतून पाणी तोच वर्षवितो; मग या पावसामुळे, निरनिराळ्या प्रकारची पैदावार पण आम्हीच निर्माण करीतो ५३

كُلُوْا وَارْعَوْا اَنْعَامَكُمْ ۗ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّاُولِي النُّهٰى ﴿٥٤﴾

तुम्ही स्वत: खा, आणि आपल्या चतुष्पादांना पण चारा[३]; काही शंका नाही की, याच्यांत बुद्धीवंतासाठी[४], पुष्कळशा निशाण्या आहेत. ५४

مِنْهَا خَلَقْنٰكُمْ وَفِيْهَا نُعِيْدُكُمْ وَمِنْهَا نُخْرِجُكُمْ تَارَةً اُخْرٰى ﴿٥٥﴾

याच जमिनीतून आम्ही तुम्हाला निर्माण केले, आणि हिच्यांतच तुम्हाला परत फिरवू, आणि हिच्यातूनच मग दुसऱ्यादा तुम्हासर्वांना[५] काढून उभे करून देऊ ५५

وَلَقَدْ اَرَيْنٰهُ اٰيٰتِنَا كُلَّهَا فَكَذَّبَ وَاَبٰى ﴿٥٦﴾

आणि आम्ही त्याला आमच्या सर्व निशाण्या दाखवून दिल्यात; परंतु तरी सुद्धा त्याने खोटे ठरवले आणि नाकारून टाकले ५६

قَالَ اَجِئْتَنَا لِتُخْرِجَنَا مِنْ اَرْضِنَا بِسِحْرِكَ يٰمُوْسٰى ﴿٥٧﴾

म्हणू लागला, हे मूसा! काय तू यासाठी आला आहेस, की, आम्हास आपल्या जादुच्या जोरावर, आपल्या देशाच्या बाहेर काढून लावावे[६] ५७

१) फिरऔनाने गोष्टीचा मोड दुसरीकडे वळविण्यासाठी, हा प्रश्न केला. म्हणजे पूर्वीचे लोक जे अल्लाहशिवाय दुसऱ्यांची उपासना करत करत, या जगांतून चालले गेले, त्यांची अवस्था काय असेल?

२) ह.मूसा عليه السلام नी उत्तरांत सांगितले, त्यांचे ज्ञान न तुला आहे न मला. तथापि त्यांचे ज्ञान माझ्या पालनकर्त्याला आहे; जे याच्याजवळ पुस्तकांत लिहून ठेवले आहे. तो त्याच्या प्रमाणे त्यांना ईनाम किंवा शिक्षा देईल. मग त्याचे ज्ञान प्रत्येक गोष्टीला अशाप्रकारे घेरून आहे. की त्याच्या नजरेतून, कोणी लहान मोठी गोष्ट, सुटू शकत नाही. न तो विसराळू आहे. जेव्हा की, जीव सृष्टीच्या ज्ञानांत, हे दोन्ही दोष आढळून येतात. एक तर त्यांचे ज्ञान, सर्वांना व्यापणारे नाही. किंबहुना अर्धवट आहे. दुसरे ज्ञानानंतर ते विसरूपण शकतात. माझा पालनकर्ता या दोन्ही दोषांपासून पवित्र आहे. पुढे, पालनकर्त्याची आणखी वैशिष्ट्ये वर्णन करण्यात येत आहेत.

३) या वेगवेगळ्या प्रकारच्या उत्पन्नांत, काही वस्तु तुमचे खाद्य, चव आणि आनंदाचे साधन आहेत. आणि काही तुमच्या चतुष्पाद जनावरांसाठी आहेत.

४) 'नुहा' बुद्धीच्या अर्थांत, 'उलून नुहा' बुद्धीवंत. बुद्धीला 'नुह्यतुन', आणि बुद्धीवंताला 'जुनुह्यातिन', यासाठी म्हणण्यांत येते की, सरशेवटी यांच्याच मतावर, मामला शेवटावर पोहचतो. किंवा यासाठी की, हे मनाला वाईटापासून रोकतात.

५) काही रिवायतीमध्ये, दफन केल्यानंतर, तीन पसा (किंवा मुठी) माती टाकाते वेळी, या महावाक्याचे म्हणणे, नबी ﷺ कडून नक्कल करण्यात आले आहे. परंतु सनदच्या दृष्टीने ही रिवायत मान्य करण्यासारखी नाही. तथापि या महावाक्याशिवाय, तीन पसा टाकण्याची रिवायत, जी इब्ने माजामध्ये आहे. सहीह आहे. म्हणून दफन केल्यानंतर दोन्ही हातांनी, तीन तीन वेळेला माती टाकण्याला, आलिमांनी योग्य ठरवले आहे. कृपया पहावे किताबुल जनाईज, पृष्ट १७२ आणि इरवाऊल गलील क्र.२५१ आवृत्ती ३, पृष्ठ २०० (कलाहमल अलबानी)

६) जेव्हा फिरऔनाला, स्पष्ट प्रमाणांबरोबर, ते चमत्कारपण दाखविण्यांत आले, जे लाठी आणि तेजस्वी चमकदार हाताच्या स्वरूपांत ह.मूसा عليه السلام ला प्रदान करण्यात आले होते; तेव्हा फिरऔन त्याला जादुचे काम समजला. आणि म्हणू लागला की, बरे, तर आम्हाला या जादुच्या जोराने, आमच्या भूमीतून काढू इच्छितोस?

| | |
|---|---|
| فَلَنَاْتِيَنَّكَ بِسِحۡرٍ مِّثۡلِهٖ فَاجۡعَلۡ بَيۡنَنَا وَبَيۡنَكَ مَوۡعِدًا لَّا نُخۡلِفُهٗ نَحۡنُ وَلَاۤ اَنۡتَ مَكَانًا سُوًى ﴿٥٨﴾ | **बरे तर आम्ही सुद्धा तुझ्या मुकाबल्यात, याच्याच सारखा जादू अवश्य आणू. बस तू आमच्या आणि आपल्या दर्म्यान, एक वायद्याचा वेळ नक्की[१] करून घे; की न आम्ही त्याच्या विरूद्ध करावे, न तू, साफ मैदानात मुकाबला व्हावा[२] ५८** |
| قَالَ مَوۡعِدُكُمۡ يَوۡمُ الزِّيۡنَةِ وَاَنۡ يُّحۡشَرَ النَّاسُ ضُحًى ﴿٥٩﴾ | **मूसाने उत्तर दिले की, शृंगार आणि उत्सवाच्या (सणाचा) दिवसाचा[३] वायदा आहे. आणि हे की लोक, दिवस वर चढताच जमा होऊन जावेत. ५९** |
| فَتَوَلّٰى فِرۡعَوۡنُ فَجَمَعَ كَيۡدَهٗ ثُمَّ اَتٰى ﴿٦٠﴾ | **मग फिरऔन परत गेला; आणि त्याने आपले गौडबंगाल जमा केले, मग येऊन पोहचला[४] ६०** |
| قَالَ لَهُمۡ مُّوۡسٰى وَيۡلَكُمۡ لَا تَفۡتَرُوۡا عَلَى اللّٰهِ كَذِبًا فَيُسۡحِتَكُمۡ بِعَذَابٍ ۚ وَقَدۡ خَابَ مَنِ افۡتَرٰى ﴿٦١﴾ | **मूसाने त्यांना म्हटले, तुमची वेळ भरून चुकली; अल्लाहवर खोटे आणि कुभांड रचू नका की, त्याने तुम्हास शिक्षा देऊन, तुमचा नाश करून टाकावा; लक्षांत ठेवा तो कधीच यशस्वी होणार नाही, ज्याने खोटी गोष्ट घडविली[५]. ६१** |
| فَتَنَازَعُوۡۤا اَمۡرَهُمۡ بَيۡنَهُمۡ وَاَسَرُّوا النَّجۡوٰى ﴿٦٢﴾ | **मग ते लोक आपसांतील सल्लामसलतीत वेगवेगळ्या मतांचे होऊन गेलेत, मग लपून, गुपचुप गुपचुप, सल्लामसलत करू लागले[६] ६२** |
| قَالُوۡۤا اِنۡ هٰذٰنِ لَسٰحِرٰنِ يُرِيۡدٰنِ اَنۡ يُّخۡرِجٰكُمۡ مِّنۡ اَرۡضِكُمۡ بِسِحۡرِهِمَا وَيَذۡهَبَا بِطَرِيۡقَتِكُمُ الۡمُثۡلٰى ﴿٦٣﴾ | **म्हणू लागले, हे दोघे निव्वळ जादूगीर आहेत; आणि त्यांचा पक्का इरादा आहे की, आपल्या जादुच्या जोरावर, तुम्हाला तुमच्या देशांतून काढून बाहेर करून द्यावे. आणि तुमच्या उत्कृष्ट धर्माला नष्ट करून टाकवे.[७] ६३** |
| فَاَجۡمِعُوۡا كَيۡدَكُمۡ ثُمَّ ائۡتُوۡا صَفًّا ۚ وَقَدۡ اَفۡلَحَ الۡيَوۡمَ مَنِ اسۡتَعۡلٰى ﴿٦٤﴾ | **तर तुम्ही सुद्धा आपली कोणी युक्ती बाकी ठेवू नका, मग रांगा बनवून मैदानांत येऊन जा; जो आज प्रबळ झाला, तोच बाजी मारून गेला ६४** |

१) 'मौइद' 'मसदर' आहे, आणि जर 'जरफ' आहे तर समय आणि ठिकाण दोन्ही अभिप्रेत होऊ शकतात की, कोणी जागा आणि दिवस, नक्की करून घे.

२) 'मकानन सुवा' साफ सपाट मैदान, जेथे होणाऱ्या मुकाबल्याला, प्रत्येक मनुष्य सहज पाहू शकेल. किंवा अशी योग्य जागा, जेथे उभय पक्ष सवलतीने पोहचू शकतील.

३) याच्याने अभिप्रेत नववर्षदिन, किंवा आणखी कोणी वार्षिक मेळा किंवा उत्सवाचा दिवस आहे, ज्याला ते ईदी सारखे साजरा करीत असत.

४) म्हणजे वेगवेगळ्या शहरातून, तज्ञ जादुगिरांना गोळा करून, एकत्र येण्याच्या जागेत येऊन पोहचला.

५) जेव्हा फिरऔन जमा होण्याच्या जागेत, जादूगिरांना मुकाबला करण्याचे प्रोत्साहन देत, आणि त्यांना ईनाम, आणि विशेष जवळीक बहाल करण्याचे जाहीर करीत होता; तेव्हा.मूसा عليه السلام नी सुद्धा मुकाबल्याच्या पूर्वी, त्यांना उपदेश केला आणि त्यांना त्यांच्या सध्याच्या चालीवर, अल्लाहच्या शिक्षेकडून भिवविले.

६) ह.मूसा عليه السلام च्या उपदेशांवर, त्यांच्यात आपसांत काही मतभेद झाला. आणि काही गुपचूप गुपचुप सांगू लागले की, खरोखर हा अल्लाहचा पैगंबर तर नसावा? त्याचे बोलणे तर जादुगरांसारखे नाही. पैगंबरांसारखे वाटते; काहींनी याच्या विरुद्ध मत प्रदर्शित केले.

७) अर्थ हा आहे की, हे दोघे भाऊ आपल्या 'जादू' च्या जोराने, प्रबळ राहिले तर प्रतिष्ठीत आणि चांगले लोक, यांच्याकडे वळून जातील. ज्यामुळे आमचे मोठेपण धोक्यांत आणि त्यांच्या मोठेपणाची शक्यता वाढून जाईल. याशिवाय आमची उत्कृष्ट पद्धती, किंवा धर्म, त्याला पण हे संपवून टाकतील. म्हणजे आपल्या शिर्कवाल्या धर्मालापण त्यांनी उत्कृष्ट ठरविले. जसे की, आज पण प्रत्येक निरर्थक धर्म, आणि पंथाचे अनुयायी याच खोट्या भ्रमांत व्यस्त आहेत. खरे सांगितले अल्लाहने, ''प्रत्येक पंथ जे त्याच्याजवळ आहे, त्यावरच आनंदित होत आहे.'' (सू.रूम-३२)

قَالُوْا يٰمُوْسٰٓى اِمَّآ اَنْ تُلْقِىَ وَاِمَّآ اَنْ نَّكُوْنَ اَوَّلَ مَنْ اَلْقٰى ﴿٦٥﴾

म्हणू लागले की, हे मूसा! एक तर तू पहिले टाक, किंवा आम्ही प्रथम टाकणारे होऊन जावे. ६५

قَالَ بَلْ اَلْقُوْا ۚ فَاِذَا حِبَالُهُمْ وَعِصِيُّهُمْ يُخَيَّلُ اِلَيْهِ مِنْ سِحْرِهِمْ اَنَّهَا تَسْعٰى ﴿٦٦﴾

(मूसाने) उत्तर दिले, नाही! तुम्हीच प्रथम टाका[१]; आता तर मूसाला असे वाटू लागले की, यांच्या दोऱ्या आणि काठ्या, त्यांच्या जादूच्या जोराने, धांवत, पळत आहेत[२] ६६

فَاَوْجَسَ فِىْ نَفْسِهٖ خِيْفَةً مُّوْسٰى ﴿٦٧﴾

मग मूसा आपल्या मनांतल्या मनांत भिऊ लागले ६७

قُلْنَا لَا تَخَفْ اِنَّكَ اَنْتَ الْاَعْلٰى ﴿٦٨﴾

आम्ही सांगितले काही भय बाळगू नकोस; खचित्च तूच प्रबळ आणि वर्चस्वशाली राहशील[३] ६८

وَاَلْقِ مَا فِىْ يَمِيْنِكَ تَلْقَفْ مَا صَنَعُوْا ۗ اِنَّمَا صَنَعُوْا كَيْدُ سٰحِرٍ ۗ وَلَا يُفْلِحُ السَّاحِرُ حَيْثُ اَتٰى ﴿٦٩﴾

आणि तुझ्या उजव्या हातात जे आहे, त्याला टाकून दे की, त्यांच्या सर्व थोतांडाला, त्याने गिळून जावे; त्यांनी जे काही बनविले आहे, हे फक्त जादूगिरांचे कर्तब आहे; आणि जादूगर कोठूनही आला तरी यशस्वी होत नाही. ६९

فَاُلْقِىَ السَّحَرَةُ سُجَّدًا قَالُوْٓا اٰمَنَّا بِرَبِّ هٰرُوْنَ وَمُوْسٰى ﴿٧٠﴾

आतांतर सर्व जादूगीर सजद्यांत पडून गेले, आणि बोलून उठले की, आम्ही तर हारून आणि मूसाच्या पालनकर्त्यावर ईमान आणले ७०

قَالَ اٰمَنْتُمْ لَهٗ قَبْلَ اَنْ اٰذَنَ لَكُمْ ۗ اِنَّهٗ لَكَبِيْرُكُمُ الَّذِىْ عَلَّمَكُمُ السِّحْرَ ۚ فَلَاُقَطِّعَنَّ اَيْدِيَكُمْ وَاَرْجُلَكُمْ مِّنْ خِلَافٍ وَّلَاُوصَلِّبَنَّكُمْ فِىْ جُذُوْعِ النَّخْلِ ۫ وَلَتَعْلَمُنَّ اَيُّنَآ اَشَدُّ عَذَابًا وَّاَبْقٰى ﴿٧١﴾

फिरऔन म्हणू लागला की, काय माझ्या परवानगी पूर्वीच, तुम्ही त्याच्यावर ईमान घेऊन आलांत ? खचित्च हा तुमचा मोठा गुरु आहे, ज्याने तुम्हा सर्वांस, जादू शिकवली आहे; (ऐकून घ्या !) मी तुमचे हातपाय उलट सुलट[४] कापवून, तुम्हा सर्वांस, खजुरीच्या खोडावर, फांशीवर लटकावून देईन; आणि तुम्हांस पूर्णपणे माहित होऊन जाईन की, आमच्यातून कोणाचा मार जास्त कडक, आणि दिर्घकाळ टिकणारा आहे. ७१

قَالُوْا لَنْ نُّؤْثِرَكَ عَلٰى مَا جَآءَنَا مِنَ الْبَيِّنٰتِ وَالَّذِىْ فَطَرَنَا فَاقْضِ مَآ اَنْتَ قَاضٍ ۗ اِنَّمَا تَقْضِىْ هٰذِهِ الْحَيٰوةَ الدُّنْيَا ﴿٧٢﴾

त्यांनी उत्तर दिले की, अशक्य आहे की, आम्ही तुला प्राधान्य द्यावे, त्या प्रमाणांवर जे आमच्यासमोर येऊन चुकले; आणि त्या अल्लाहवर ज्याने आम्हांस निर्माण केले आहे; आतां[५] तर तू जे काही करणार आहेस, ते करून टाक; तू जो काही हुकूम चालवू शकतो, तो याच ऐहिक[६] जीवनांतच आहे. ७२

اِنَّآ اٰمَنَّا بِرَبِّنَا لِيَغْفِرَ لَنَا خَطٰيٰنَا وَمَآ اَكْرَهْتَنَا عَلَيْهِ مِنَ السِّحْرِ ۗ وَاللّٰهُ خَيْرٌ وَّاَبْقٰى ﴿٧٣﴾ (الثلثة)

आम्ही या (आशेने) आपल्या पालनकर्त्यावर ईमान आणले की, त्याने आमची पापे क्षमा करून टाकावीत; आणि (विशेष करून जादुगिरी (चे पाप) करण्यावर ज्याच्यावर तू आम्हास[७] भाग पाडले. अल्लाहच उत्तम आणि फारच चिरस्थायी आहे[८]. ७३

१) ह. मूसा عليه السلام नी पहिले त्यांना आपले करतब दाखविण्यांस सांगितले. कारण की त्यांच्यावर हे स्पष्ट होऊन जावे, की ते जादुगिरांच्या एवढ्या मोठ्या संख्येने, जी फिरऔन गोळा करून घेऊन आला आहे, आणि अशाचप्रकारे त्यांची जादूची कमाल आणि करतबने भयग्रस्त नाही. दुसरे यांची जादुची हातचलाखी, जेव्हा अल्लाहच्या चमत्काराने, क्षणभरात, कापसाच्या कणाप्रमाणे होऊन जाईल, तर त्याचा फार चांगला परिणाम होईल. आणि जादूगिरांना यावर विचार करणे भाग पडेल, की ही जादू नाही. खरोखर याला अल्लाहचे समर्थन प्राप्त आहे की, एका क्षणांत त्याची एक लाठी आमच्या सर्व करतबाला गिळून गेली?

२) कुरआनाच्या या शब्दांनी ठाऊक होते की, दोऱ्या आणि काठ्या, वास्तविक साप बनल्या नव्हत्या. किंबहुना जादूच्या जोराने, असे वाटत होते जशी मेसमेरिजम् ने नजरबंदी केली जाते. तथापि त्याचा हा परिणाम आवश्य होतो

की, तात्कालिक आणि त्यावेळेपुरते, पहाणाऱ्यांना एक भीती वाटायला लागते. जरी वस्तुंची वास्तविकता बदलत नाही. दुसरी ही गोष्ट ठाऊक झाली की जादू कितीही उच्च दर्जाची असो, ती वस्तुंची वास्तविकता बदलू शकत नाही.

३) या भयावह दृष्याला पाहून, जर ह.मूसा ﷺ ला भीती वाटली, तर ही एक स्वाभाविक गोष्ट होती. जी पैगंबरीच्या कमालच्या विरूद्ध नव्हती. कारण की, पैगंबरसुद्धा मनुष्यच असतो. आणि मनुष्यत्वाच्या स्वाभाविक तगाद्यांच्या तो पलिकडे नसतो आणि न असू शकतो. याच्याने हे पण ठाऊक झाले की, ज्याप्रमाणे पैगंबरांना दुसरे आजार होऊ शकतात, त्याचप्रमाणे ते जादुने पण प्रभावित होऊ शकतात. ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर सुद्धा, यहुद्यांनी जादू केली होती. ज्याचे काही परिणाम आपणांस जाणवत होते. याच्याने सुद्धा पैगंबरीपदावर काही दोष येत नाही. कारण याच्याने पैगंबरीचे काम प्रभावित होत नाही. अल्लाहतआला पैगंबराचे संरक्षण करतो. आणि जादूने वह्य किंवा पैगंबरीपदाची कर्तव्ये पार पाडणे याच्यावर काही परिणाम होऊ देत नाही. आणि शक्य आहे की ही भीती यासाठी असावी की, माझी लाठी टाकण्याच्यापूर्वीच कोठे लोक, या करतबाने आणि हातचलाखीने प्रभावित न होऊन जावेत. परंतु ही भीती यासाठी वाटली की, जादुगिरांनी पण जे करतब दाखविले ते लाठ्यांच्या मार्फतच दाखविले होते. जेव्हांकी ह.मूसा ﷺ जवळ पण लाठीच होती, जिला त्यांना जमिनीवर फेकावयाची होती. ह.मूसा ﷺ च्या मनांत विचार आला की, पहाणारे या शंकेत आणि चुकीच्या धारणेंत न पडून जावेत, आणि त्यांनी असे समजू नये की, दोघांनी एकाच प्रकारची जादू सादर केली. यासाठी हा निर्णय कसा व्हावा की, कोणती जादू आहे आणि कोणता चमत्कार? कोण वर्चस्व पावतो आणि कोण पराजित होतो? जणू जादू आणि चमत्काराचा जो फरक स्पष्ट करण्याचा उद्देश्य आहे, तो वरील चुकीच्या धारणेने प्राप्त होऊ शकणार नाही. याच्याने ठाऊक झाले की, पैगंबरांना केव्हा केव्हा हे ज्ञान पण नसते की, त्यांच्या हातून कोणत्या प्रकारचा चमत्कार, जाहीर होणार आहे. स्वत: चमत्कार जाहीर करण्याचे सामर्थ्य तर दुरची गोष्ट आहे, हे तर केवळ अल्लाहचेच काम आहे की त्याने पैगंबरांच्या हाताने चमत्कार सादर करावे. तथापि ह.मूसा ﷺ च्या या अंदेशा आणि भीतीला दूर करीत, अल्लाहतआलाने फर्माविले हे मूसा ! कशाही दृष्टीने घाबरण्याचे कारण नाही, तूच प्रबळ राहशील. या महावाक्याने स्वभाविकच भीती, आणि दुसरे अंदेशे, सर्वांचेच निर्सन करून टाकले. म्हणून झालेही असेच; जसे की पुढील महावाक्यांत आहे.

४) उलटे सुलटेचा अर्थ आहे उजवा हात व डावा पाय आणि डावा हात व उजवा पाय.

५) हे भाषांतर त्या स्वरूपांत आहे, जेव्हा, 'वल्लजी फतरना' चा 'अतफ' 'माजाअना' वर असेल; आणि हे पण बरोबर आहे. तथापि काही भाष्यकारांनी याला शपथ ठरविले आहे. म्हणजे शपथ त्या व्यात्कीत्वाची, ज्याने आम्हास निर्माण केले. आम्ही तुला, या प्रमाणावर प्राधान्य देणार नाही; जे आमच्या समोर येऊन चुकले.

६) म्हणजे तुला जे काही वशीभूत आहे, ते करून घे. आम्हांस ठाऊक आहे की, तुझा जोर फक्त या जगांतच चालू शकतो. जेव्हा की आम्ही, ज्या पालनकर्त्यावर ईमान आणले आहे, त्याचे अधिपत्त्य तर, इहलोक आणि परलोक दोन्ही ठिकाणांवर आहे. मरून गेल्यानंतर आम्ही तुझे अधिपत्य, आणि तुझ्या जुलूम अत्त्याचारापासून, वाचून जाऊ. कारण की शरीरातून आत्मा निघून गेल्यानंतर, तुझा अधिकार संपून जाणार. परंतु जर आम्ही आमच्या पालनकर्त्याचे आज्ञाभंजक राहिलो, तर आम्ही मेल्यावर सुद्धा, पालनकर्त्याच्या अखत्याराच्या बाहेरी निघूशकत नाही. तो आम्हांस कडक शिक्षा देण्यास समर्थ आहे. पालनकर्त्यावर ईमान आणल्यानंतर, एका ईमानवाल्याच्या जीवनांत, एक मोठी क्रांती येणे, आणि या जगाची क्षणभंगुरता, आणि परलोकाच्या कायमच्या जीवनावर, ज्याप्रमाणे विश्वास असावयांस पाहिजे आणि मग या ईमानाच्या श्रद्धेवर जी संकटे, इजा पोहोचतील, त्यांना ज्या धैर्य व सहनशिलता, आणि पराकाष्टता आणि दृढतेने सहन करावयांस पाहिजे, जादुगिरांनी याचा एक उत्कृष्ट नमुना पेश केला की, ईमान आणण्याच्या पूर्वी, कशाप्रकारे ते बक्षीसे, ऐहिक मानमर्तबा व अधिकाराची पदे, यांचे इच्छुक होते. परंतु ईमान आणल्यानंतर, कुठलीही लालुच आणि आमिष त्यांना डांवाडोल करूंशकली नाही की, इजा पोहचण्याच्या आणि शिक्षा देण्याच्या धमक्या त्यांना ईमानाकडून फिरवून देण्यांत यशस्वी होऊं शकल्या नाहीत.

७) दुसरे भाषांतर याचे हे आहे की, ''आमच्या त्या चुका पण माफ करून दे, ज्या मूसा ﷺ च्या मुकाबल्यात, तू भाग पाडल्यावर, आम्ही जादुच्या कर्माच्या स्वरूपांत केल्यात.''

८) हे फिरऔनचे शब्द, ''वलतअ्लमुन्न अय्युना अशद्दु अजाबव् व अबका'' चे उत्तर आहे. की हे फिरऔना ! ज्या कडक शिक्षांची आम्हास तू धमकी देत आहेस, अल्लाहतआलाकडे आम्हास जे पुण्यप्रतिफळ मिळेल, ते यापेक्षा कितीतरी जास्त उत्तम आणि टिकाऊ आहे.

اِنَّهٗ مَنْ یَّاْتِ رَبَّهٗ مُجْرِمًا فَاِنَّ لَهٗ جَهَنَّمَ ؕ لَا یَمُوْتُ فِیْهَا وَ لَا یَحْیٰی ﴿۷۴﴾

**गोष्ट अशीच आहे की, जो पण गुन्हेगार बनून अल्लाहकडे जाईल, त्याच्यासाठी नरकाग्नी आहे; जेथे न मृत्यू येईल, आणि न जीवन[१] (७४)**

وَ مَنْ یَّاْتِهٖ مُؤْمِنًا قَدْ عَمِلَ الصّٰلِحٰتِ فَاُولٰٓئِكَ لَهُمُ الدَّرَجٰتُ الْعُلٰی ﴿۷۵﴾

**आणि जो पण त्याच्याजवळ ईमानवाला बनून जाईल, आणि त्याने कर्मेपण चांगली केली असतील, त्याच्यासाठी बडे बडे दर्जे असतील (७५)**

جَنّٰتُ عَدْنٍ تَجْرِیْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِیْنَ فِیْهَا ؕ وَ ذٰلِكَ جَزٰٓؤُا مَنْ تَزَكّٰی ﴿۷۶﴾

**नेहमी राहण्याच्या बागा, ज्यांच्याखालून पाट वाहत असतील. जेथे ते सदासर्वदा राहतील. हेच बक्षीस आहे प्रत्येक त्या माणसाचे, जो पवित्र झाला.[२] (७६)**

وَ لَقَدْ اَوْحَیْنَاۤ اِلٰی مُوْسٰۤی ۙ۬ اَنْ اَسْرِ بِعِبَادِیْ فَاضْرِبْ لَهُمْ طَرِیْقًا فِی الْبَحْرِ یَبَسًا ۙ لَّا تَخٰفُ دَرَكًا وَّ لَا تَخْشٰی ﴿۷۷﴾

**आणि आम्ही मूसाकडे वह्य अवतरीत केले की, तू रातोरात माझ्या सेवकांना घेऊन चल[३]. आणि त्यांच्यासाठी, समुद्रांत कोरडा रस्ता बनवून घे[४]. मग न तुला कोणाच्या येऊन पकडण्याचा धोका राहील न भीती[५] (७७)**

فَاَتْبَعَهُمْ فِرْعَوْنُ بِجُنُوْدِهٖ فَغَشِیَهُمْ مِّنَ الْیَمِّ مَا غَشِیَهُمْ ؕ ﴿۷۸﴾

**फिरऔनाने आपल्या सैन्यासह त्यांचा पाठलाग केला; मग तर समुद्राने त्या सर्वांना, घेरुन घेतले, जसे की घेरुन घेणार होता.[६] (७८)**

وَ اَضَلَّ فِرْعَوْنُ قَوْمَهٗ وَ مَا هَدٰی ﴿۷۹﴾

**आणि फिरऔनाने आपल्या लोकांस बहकविले, आणि सरळ मार्ग दाखविला नाही.[७] (७९)**

یٰبَنِیْۤ اِسْرَآءِیْلَ قَدْ اَنْجَیْنٰكُمْ مِّنْ عَدُوِّكُمْ وَ وٰعَدْنٰكُمْ جَانِبَ الطُّوْرِ الْاَیْمَنَ وَ نَزَّلْنَا عَلَیْكُمُ الْمَنَّ وَ السَّلْوٰی ﴿۸۰﴾

**हे बनी इस्राईलांनो! (पहा,) आम्ही तुम्हास तुमच्या शत्रुपासून मुक्ती दिली; आणि तुमच्याशी तूर पर्वताच्या उजवीकडीलचा वायदा केला[८]; आणि तुमच्यावर मन्न आणि सल्वा उतारले[९] (८०)**

१) म्हणजे शिक्षांना त्रासून, मृत्युची आकांक्षा कराल तरी मृत्यू येणार नाही. आणि रात्रंदिवस शिक्षेत व्यस्त राहणे, खाण्यापिण्यासाठी निवडुंगासारखा कांटेदार वृक्ष, आणि नर्कवासियांच्या शरीरांतून निथरलेले रक्त आणि पूं, मिळणे हे काय जीवन असेल? ''अल्लाहुम्मा अजिरना मिन अजाबी जहन्नम'' (आमीन) (हे अल्लाह आम्हाला नर्काग्नीपासून सुरक्षित ठेव)

२) नर्कवासियांच्या मुकाबल्यांत, ईमानवाल्यांना स्वर्गाचे पूर्ण सुखासमाधानाचे जे जीवन मिळेल, याचा उल्लेख केला; आणि स्पष्ट करून दिले की, याला पात्र ते लोक असतील, जे ईमान आणल्यानंतर याचे तगादे पण पूर्ण करतील; म्हणजे पुण्याची कामे अंगिकारणे आणि आपल्या जीवाला पापांत लिप्त होण्यापासून पवित्र करतील. यासाठी की, ईमान जिभेने फक्त काही शब्द उच्चारण्याचे नांव नाही. किंबहुना श्रद्धा आणि कर्माच्या एकत्रित करण्याचे नाव आहे.

३) जेव्हा फिरऔनाने ईमान पण आणले नाही, आणि बनी इस्राईलला स्वतंत्र करण्यांस पण तयार झाला नाही, तेव्हांअल्लाहतआलाने ह.मूसा عليه السلام ला हा हुकूम दिला.

४) याचा खुलासा सू.शुअराअ मध्ये येईल, की, ह.मूसा عليه السلام नी अल्लाहच्या हुकुमाने समुद्रांत लाठी मारली, ज्यामुळे त्यांतून जाण्यासाठी कोरडा रस्ता बनून गेला.

५) धोका फिरऔन आणि त्याच्या सैन्याचा, आणि भीती पाण्यांत बुडून जाण्याची.

६) म्हणजे या कोरड्या रस्त्यावर जेव्हां, फिरऔन आणि त्याचे लष्कर चालू लागले, तेव्हा अल्लाहने समुद्राला हुकूम दिला की पूर्वीसारखा होऊन जा ! म्हणून तो कोरडा रस्ता, डोळ्याची पापणी लावते न लावते एवढ्यांत, समुद्रांच्या लाटांत बदलून गेला; आणि फिरऔनासह सारे सैन्य, बुडून गेले. समुद्राचे पाणी त्यांच्यावर वर्चस्व पावले.

७) यासाठी की समुद्रांत बुडणे त्यांच्या दैवात होते.

८) याचा अर्थ हा आहे की, ह.मूसा عليه السلام तुम्हाला म्हणजे तुमच्या प्रतिनिधींना तूर पर्वतावर घेऊन यावे.कारण की, तुमच्यासमोरच, आम्ही मूसाशी संभाषण करू. किंवा तूर पर्वतावर मूसाला बोलाविणे, बनी इस्राईलच्याचसाठी आणि त्यांच्याच हिदायत आणि मार्गदर्शनासाठी होते.

९) मन्न आणि सल्वाच्या अवतरीत होण्याची घटना, सू.बकर: च्या सुरवातीला येऊन चुकली आहे. 'मन्' कोणी गोड वस्तू होती, जी आकाशांतून उतरत असे. आणि सल्वाने अभिप्रेत, बटेर पक्षी आहेत; जे भरपूर प्रमाणांत त्यांच्याजवळ येत. आणि त्यांना ते आवश्यकतेनुसार पकडून शिजवत आणि खात. (इब्ने कसीर)

كُلُوا مِن طَيِّبَٰتِ مَا رَزَقۡنَٰكُمۡ وَلَا تَطۡغَوۡاْ فِيهِ فَيَحِلَّ عَلَيۡكُمۡ غَضَبِيۖ وَمَن يَحۡلِلۡ عَلَيۡهِ غَضَبِي فَقَدۡ هَوَىٰ ﴿٨١﴾

तुम्ही आम्ही दिलेली (शुद्ध आणि) चोखी रोजी खा;आणि याच्यांत मर्यादेच्या पुढे जाऊ नका[१]; नाही तर तुमच्यावर माझा प्रकोप अवतरीत होईल, आणि ज्याच्यावर माझा प्रकोप अवतरीत होऊन जाईल, तो खचित्‌च बर्बाद झाला[२] ८१

وَإِنِّي لَغَفَّارٞ لِّمَن تَابَ وَءَامَنَ وَعَمِلَ صَٰلِحٗا ثُمَّ ٱهۡتَدَىٰ ﴿٨٢﴾

आणि हां! नि:संशय, मी त्यांना क्षमा करून टाकेन, जे तौबा करतील, ईमान आणतील, चांगली कामे करतील, आणि सरळ मार्गावर पण राहतील.[३] ८२

۞وَمَآ أَعۡجَلَكَ عَن قَوۡمِكَ يَٰمُوسَىٰ ﴿٨٣﴾

आणि हे मूसा! तू त्वरा करून, आपल्या लोकांपेक्षा कसा पुढे आलास? ८३

قَالَ هُمۡ أُوْلَآءِ عَلَىٰٓ أَثَرِي وَعَجِلۡتُ إِلَيۡكَ رَبِّ لِتَرۡضَىٰ ﴿٨٤﴾

त्याने म्हटले की ते लोक पण माझ्या मागे मागे आहेत; आणि मी, हे माझ्या पालनकर्त्या! तुझ्याकडे लवकर येण्याचे यासाठी केले की, तू खूष होऊन जावेस[४] ८४

قَالَ فَإِنَّا قَدۡ فَتَنَّا قَوۡمَكَ مِنۢ بَعۡدِكَ وَأَضَلَّهُمُ ٱلسَّامِرِيُّ ﴿٨٥﴾

(अल्लाहने) सांगितले, आम्ही तुझ्या लोकांना, तुझ्यामागे, (एका) कसोटीत टाकले आहे; आणि त्यांना सामरीने बहकवून टाकले आहे.[५] ८५

فَرَجَعَ مُوسَىٰٓ إِلَىٰ قَوۡمِهِۦ غَضۡبَٰنَ أَسِفٗاۚ قَالَ يَٰقَوۡمِ أَلَمۡ يَعِدۡكُمۡ رَبُّكُمۡ وَعۡدًا حَسَنًاۚ أَفَطَالَ عَلَيۡكُمُ ٱلۡعَهۡدُ أَمۡ أَرَدتُّمۡ أَن يَحِلَّ عَلَيۡكُمۡ غَضَبٞ مِّن رَّبِّكُمۡ فَأَخۡلَفۡتُم مَّوۡعِدِي ﴿٨٦﴾

मग मूसा फारच नाराज होऊन, सखेद, परत आले; आणि म्हणू लागले हे माझ्या समाजबांधवांनो! का तुमच्या पालनकर्त्याने तुमच्याशी उत्तम वायदा केला नव्हता[६]? का तुम्हास त्याची मुदत लांब वाटली[७]? किंबहुना तुमचा विचारच हा होता की, तुमच्या पालनकर्त्याचा तुमच्यावर प्रकोप ओढवावा? की तुम्ही माझ्या वायद्याच्या विरूद्ध केले.[८] ८६

قَالُواْ مَآ أَخۡلَفۡنَا مَوۡعِدَكَ بِمَلۡكِنَا وَلَٰكِنَّا حُمِّلۡنَآ أَوۡزَارٗا مِّن زِينَةِ ٱلۡقَوۡمِ فَقَذَفۡنَٰهَا فَكَذَٰلِكَ أَلۡقَى ٱلسَّامِرِيُّ ﴿٨٧﴾

त्यांनी उत्तर दिले की, आम्ही आपल्या अखत्याराने, तुमच्याशी वायद्याच्या विरूद्ध केले नाही[९]; किंबहुना, आमच्यावर लोकांच्या दागदागिन्यांचे जे (ओझे) लादले गेले होते; त्यांना आम्ही (अग्नीत) टाकून दिले; आणि अशाचप्रकारे सामरीने पण टाकून दिले. ८७

فَأَخۡرَجَ لَهُمۡ عِجۡلٗا جَسَدٗا لَّهُۥ خُوَارٞ فَقَالُواْ هَٰذَآ إِلَٰهُكُمۡ وَإِلَٰهُ مُوسَىٰ فَنَسِيَ ﴿٨٨﴾

मग त्याने लोकांसाठी (त्यांतून) एक वासरू (ओतून) काढून उभे केले. म्हणजे वांसराची मूर्ती, ज्याचा गाईसारखा आवाज पण होता. मग म्हणू लागला की हाच तुमचा पण उपास्य[१०] आहे, आणि मूसाचा पण; परंतु मूसा विसरून गेला आहे. ८८

٤ ١٣ ١٣ أَفَلَا يَرَوۡنَ أَلَّا يَرۡجِعُ إِلَيۡهِمۡ قَوۡلٗا وَلَا يَمۡلِكُ لَهُمۡ ضَرّٗا وَلَا نَفۡعٗا ﴿٨٩﴾

४ १३ १३ का हे मार्गभ्रष्ट लोक, हे पण बघत नाही, की ते तर यांच्या गोष्टीचे उत्तरपण देऊ शकत नाही; तसेच त्यांच्या बऱ्या वाईटाचा काही अधिकार पण बाळगत नाही[११]. ८९

وَلَقَدۡ قَالَ لَهُمۡ هَٰرُونُ مِن قَبۡلُ يَٰقَوۡمِ إِنَّمَا فُتِنتُم بِهِۦۖ وَإِنَّ رَبَّكُمُ ٱلرَّحۡمَٰنُ فَٱتَّبِعُونِي وَأَطِيعُوٓاْ أَمۡرِي ﴿٩٠﴾

आणि हारूनने याच्या पूर्वीच त्यांना सांगून दिले होते, हे माझ्या समाजबंधुनो! या वांसराने तर तुमची कसोटी घेतली जात आहे. तुमचा वास्तविक पालनकर्ता तर अल्लाह परम दयाळूच आहे. बस! तुम्ही माझी ताबेदारी करा, आणि माझी गोष्ट मानून चला.[१२] ९०

قَالُواْ لَن نَّبۡرَحَ عَلَيۡهِ عَٰكِفِينَ حَتَّىٰ يَرۡجِعَ إِلَيۡنَا مُوسَىٰ ﴿٩١﴾

ते म्हणाले की, मूसाच्या परतीपर्यंत, तर आम्ही या (वत्सपुजे) वरच बसून राहू[१३] ९१

१) 'तुगयान' चा अर्थ आहे मर्यादेबाहेर जाणे. म्हणजे विहीत आणि योग्य गोष्टींना सोडून, निषिद्ध आणि अयोग्य गोष्टीकडे मर्यादा सोडून जाऊ नका. किंवा अल्लाहच्या देणग्यांना नाकारून, किंवा देणग्यांच्या प्रति कृतघ्नता दर्शवून, किंवा देणग्यांच्या दाव्याचा आज्ञाभंग करून, मर्यादेच्या बाहेर जाऊ नका. या सर्व भावार्थावर 'तुग्यान' चा

शब्द वापरण्यांत येतो. आणि काहींनी म्हटले आहे की, तुग्यानचा भावार्थ आहे, आवश्यकता आणि गरजेपेक्षा जास्त पक्षी पकडणे. म्हणजे गरजेनुसार पक्षी पकडा. आणि याच्यापुढे जाऊ नका.

२) दुसरा अर्थ हा सांगितला गेला आहे की, तो हाविय: म्हणजे नरकाग्नीत पडला. हाविय: नरकाग्नीचा खालचा भाग आहे. म्हणजे नरकाग्नीच्या खोल भागाला पात्र होऊन गेला.

३) म्हणजे अल्लाहच्या क्षमादानाला पात्र होण्यासाठी, चार गोष्टी आवश्यक आहेत. कुफ्र, शिर्क आणि पापांपासून तौबा, ईमान, चांगली कर्मे, आणि सरळ मार्गावर चालत राहणे म्हणजे दृढता, येथ पावेतो की, त्याला ईमानावरच मृत्यु यावा. नाही तर उघड गोष्ट आहे की, तौबा आणि ईमानानंतर, जर त्याने पुन्हा, शिर्क आणि कुफ्रचा मार्ग अंगिकारला, येथपावेतो की, मृत्युपण त्याला कुफ्र व शिर्कवरच आला, तर मग अल्लाहच्या क्षमादानाऐवजी, शिक्षेला पात्र होईल.

४) समुद्र पार केल्यानंतर ह.मूसा عليه السلام बनी इस्राईल मधल्या प्रतिष्ठीत लोकांना बरोबर घेऊन तूर पर्वताकडे चालले; परंतु (आपल्या) पालनकर्त्याच्या भेटीच्या ओढीने, जलद चालीने, साथीदारांना मागे सोडून एकटेच तूर वर पोहचून गेले. प्रश्न विचारल्यावर उत्तर दिले की, मला तर तुझी प्रसन्नता मिळवण्याची घाई होती. ते लोक माझ्यामागे येत आहेत; काही म्हणतात की, याचा अर्थ हा नाही की, माझ्या मागे येत आहेत; किंबहुना हा आहे की, ते माझ्या मागे तूर पर्वताच्या जवळच आहेत. आणि तेथे माझ्या परतण्याची वाट पाहत आहेत.

५) ह.मूसा عليه السلام नंतर सामरी नामक माणसाने, बनी इस्राईलला वासराची पुजा करण्यावर लावून दिले. ज्याची सूचना अल्लाहतआलाने, मूसा عليه السلام ला, तूर पर्वतावर दिली, की सामरीने तर तुझ्या लोकांना मार्गभ्रष्ट करून टाकले आहे. फितन्यांत टाकण्याचा संबंध, अल्लाहने आपल्याकडे निर्मात्याच्या हैशियतने केला आहे; नाही तर या मार्गभ्रष्टतेला कारण तर सामरीच होता. जसे की, 'अजल्लहुमुस् सामिरीय्यु' ने स्पष्ट आहे.

६) याच्याने अभिप्रेत स्वर्ग किंवा विजयाचा वायदा आहे. जर ते धर्मावर कायम राहिले. किंवा तौरात प्रदान करण्याचा वायदा आहे. ज्यासाठी तूर वर त्यांना बोलविण्यांत आले होते.

७) का ह्या वायद्याची मुदत फार लांबून गेली होती, की तुम्ही विसरून गेले. आणि वासरांची पुजा सुरू करून दिली.

८) लोकांनी ह.मूसा عليه السلام शी वायदा केला होता की, त्यांच्या 'तूर' हून परत येईपर्यंत, ते अल्लाहच्या आज्ञापालनांत आणि उपासनेत कायम राहतील किंवा हा वायदा होता की, आम्ही पण तूर वर तुमच्या मागे येत आहोत. परंतु रस्त्यांतच थांबून, वासरू पूजन सुरू करून दिले.

९) म्हणजे आम्ही आपल्या अखत्यारीने हे काम केले नाही. परंतु ही चूक आमच्याकडून अस्वस्थतेमुळे होऊन गेली. पुढे याचे कारण सांगितले.

१०) 'जीनत' ने दागिने आणि अल्कौमने, फिरऔनाचे लोक अभिप्रेत आहेत. असे म्हणतात की हे दाग दागीने, त्यांनी फिरऔनीकडून, कर्ज म्हणून मागून घेतले होते. याचसाठी त्यांना 'अवजार' (विज्र (ओझे) चे अनेकवचन) म्हणजे ओझे म्हटले गेले आहे. कारण की हे त्यांच्यासाठी योग्य नव्हते. ज्यामुळे त्यांना गोला करुन एका खड्ड्यात टाकून दिले. सामरी ने पण (काही मार्गभ्रष्ट पंथाप्रमाणे) जो मार्गभ्रष्ट होता. काही टाकले (आणि ती माती होती जसे की पुढे खुलासा येईल) मग त्याने सर्व दागिन्यांना तापवून, अशाप्रकारे वांसरू बनवून दिले की ज्याच्यांत हवेच्या आंत बाहेर येण्या जाण्याने, एक प्रकारचा आवाज निर्माण होत होता. या आवाजाने त्याने बनी इस्राईलला मार्गभ्रष्ट केले की मूसा عليه السلام तर मार्गभ्रष्ट होऊन गेले आहेत की, ते अल्लाहला भेटण्यासाठी, 'तूर' वर गेले आहेत. जेव्हांकी तुमचा आणि मूसा عليه السلام चा उपास्य तर हा आहे.

११) अल्लाहतआला त्यांच्या अडाणीपणा आणि नादानीचा खुलासा करतांना सांगत आहे की, त्या अकलेच्या आंधळ्यांना एवढेपण समजले नाही, की, हे वासरू काही उत्तर देऊ शकत नाही, तसेच काही नफा नुकसान पोहचविण्यांस पण समर्थ नाही. जेव्हाकी, उपास्य तर तोच होऊं शकतो, जो प्रत्येकाची फिर्याद ऐकल्यानंतर, नफा नुकसान पोहचविण्याला, आणि इच्छापूर्ती करण्याला, समर्थ आहे.

१२) ह.हारून عليه السلام हे, त्यावेळी म्हणाले, जेव्हा हे लोक सामरीच्या मागे लागून, वासराच्या उपासनेत लागून गेलेत.

१३) इस्राईलांना हे वासरू, इतके चांगले वाटले की, हारून عليه السلام च्या गोष्टीची पण काही पर्वा केली नाही. आणि त्याचा आदर आणि उपासना सोडून देण्यात नकार दिला.

قَالَ يَٰهَٰرُونُ مَا مَنَعَكَ إِذْ رَأَيْتَهُمْ ضَلُّوٓا۟ ﴿٩٢﴾

मूसा म्हणू लागले, हे हारून! त्यांना आडमार्गी भटकतांना पहात असतांना, तुला कोणत्या गोष्टीने अडविले? (९२)

أَلَّا تَتَّبِعَنِ ۖ أَفَعَصَيْتَ أَمْرِى ﴿٩٣﴾

की तू माझे अनुकरण न करावेस. काय तू पण माझ्या आज्ञेचा आज्ञाभंजक होऊन बसलास[१]? (९३)

قَالَ يَبْنَؤُمَّ لَا تَأْخُذْ بِلِحْيَتِى وَلَا بِرَأْسِىٓ ۖ إِنِّى خَشِيتُ أَن تَقُولَ فَرَّقْتَ بَيْنَ بَنِىٓ إِسْرَٰٓءِيلَ وَلَمْ تَرْقُبْ قَوْلِى ﴿٩٤﴾

हारून बोलले की हे माझ्या सहोदर भावा! माझी दाढी धरू नकोस आणि माझे केस ओढू नकोस; मला फक्त हा विचार आला की कोठे तुम्ही असे न म्हणावे[२], की तू बनी इस्राईलांमध्ये फुट टाकून दिली. आणि माझ्या चांगली गोष्टीची वाट पाहिली नाहीस[३] (९४)

قَالَ فَمَا خَطْبُكَ يَٰسَٰمِرِىُّ ﴿٩٥﴾

मूसाने विचारले की, सामरी तुझी काय गत आहे? (९५)

قَالَ بَصُرْتُ بِمَا لَمْ يَبْصُرُوا۟ بِهِۦ فَقَبَضْتُ قَبْضَةً مِّنْ أَثَرِ ٱلرَّسُولِ فَنَبَذْتُهَا وَكَذَٰلِكَ سَوَّلَتْ لِى نَفْسِى ﴿٩٦﴾

तो म्हणाला की, मला ती वस्तू दिसली, जी यांना दिसली नाही. तेव्हा तू म्हणत रहावे मी अल्लाहच्या दुताच्या पद चिन्हांतून, एक मूठ भरून घेतली, तिला याच्यांत टाकून दिले[४]; अशाच प्रकारे माझ्या मनाने ही गोष्ट, माझ्यासाठी बनवून दिली. (९६)

قَالَ فَٱذْهَبْ فَإِنَّ لَكَ فِى ٱلْحَيَوٰةِ أَن تَقُولَ لَا مِسَاسَ ۖ وَإِنَّ لَكَ مَوْعِدًا لَّن تُخْلَفَهُۥ ۖ وَٱنظُرْ إِلَىٰٓ إِلَٰهِكَ ٱلَّذِى ظَلْتَ عَلَيْهِ عَاكِفًا ۖ لَّنُحَرِّقَنَّهُۥ ثُمَّ لَنَنسِفَنَّهُۥ فِى ٱلْيَمِّ نَسْفًا ﴿٩٧﴾

म्हटले, बरे, जा! या जगाच्या जीवनामध्ये, तुझी शिक्षा ही आहे की, मला न शिवावे[५]. आणि एक आणखी पण वायदा तुझ्यासाठी आहे, जो तुझ्याने आजिबात टळणार नाही[६]. आणि आता तू आपल्या उपास्याला पण पाहून घेशील, ज्याच्यावर तू एकनिष्ठ होऊन बसला होता; की आम्ही त्यास जाळून, समुद्रामध्ये कण कण (करून) उडवून टाकू[७] (९७)

إِنَّمَآ إِلَٰهُكُمُ ٱللَّهُ ٱلَّذِى لَآ إِلَٰهَ إِلَّا هُوَ ۚ وَسِعَ كُلَّ شَىْءٍ عِلْمًا ﴿٩٨﴾

खरी गोष्ट हीच आहे की, तुम्हा सर्वांचा अस्सल उपास्य फक्त अल्लाहच आहे; त्याच्याशिवाय अन्य कोणी उपासनेच्या लायक नाही. त्याचे ज्ञान सर्व वस्तुस व्यापून आहे. (९८)

كَذَٰلِكَ نَقُصُّ عَلَيْكَ مِنْ أَنۢبَآءِ مَا قَدْ سَبَقَ ۚ وَقَدْ ءَاتَيْنَٰكَ مِن لَّدُنَّا ذِكْرًا ﴿٩٩﴾

अशा प्रकारे आम्ही तुझ्यासमोर[८], पूर्वीच्या होऊन चुकलेल्या घटना वर्णन करीत आहोत; आणि खचित्‌च आम्ही तुला आपल्याकडून बोध प्रदान करून चुकलो आहोत[९] (९९)

مَّنْ أَعْرَضَ عَنْهُ فَإِنَّهُۥ يَحْمِلُ يَوْمَ ٱلْقِيَٰمَةِ وِزْرًا ﴿١٠٠﴾

याकडून जो तोंड, फिरवेल[१०], तो खचित्‌च कयामतच्या दिवशी आपले भारी ओझे लादलेला असेल[११] (१००)

خَٰلِدِينَ فِيهِ ۖ وَسَآءَ لَهُمْ يَوْمَ ٱلْقِيَٰمَةِ حِمْلًا ﴿١٠١﴾

ज्यात नेहमीच राहील[१२]. आणि त्यांच्याकरीता कयामतच्या दिवशी (मोठे) वाईट ओझे आहे. (१०१)

يَوْمَ يُنفَخُ فِى ٱلصُّورِ ۚ وَنَحْشُرُ ٱلْمُجْرِمِينَ يَوْمَئِذٍ زُرْقًا ﴿١٠٢﴾

ज्या दिवशी सूर[१३] फुंकला जाईल, आणि गुन्हेगारांना आम्ही त्या दिवशी, (भीतीमुळे) निळ्या पिवळ्या डोळ्यांसह, घेरून आणू (१०२)

يَتَخَٰفَتُونَ بَيْنَهُمْ إِن لَّبِثْتُمْ إِلَّا عَشْرًا ﴿١٠٣﴾

ते आपसात हळूहळू बोलत[१४] असतील, की आम्ही तर (जगांत) फक्त दहा दिवसच राहिलो. (१०३)

१) म्हणजे जर, त्यांनी तुझी गोष्ट मानण्यांस नकार दिला होता, तर तू लगेच माझ्यामागे, तूर पर्वतावर येऊन, मला सांगावयास पाहिजे होते. तू सुद्धा माझ्या हुकूमाची पर्वा केली नाहीस; म्हणजे वारस होण्याचा हक्क बरोबर बजावला नाहीस.

२) ह.मूसा (عليه السلام) आपल्या लोकांना शिर्कमध्ये पडलेले पाहून फारच क्रोधीत होते. आणि त्यांना असे वाटत होते की, कदाचित याच्यांत, त्यांचे भाऊ हारून, ज्यांना ते आपला प्रतिनिधी बनवून गेले होते, यांचा हलगर्जीपणा पण कारणीभूत असावा. म्हणून फारच क्रोधात येऊन, हारून (عليه السلام) ची दाढी आणि डोके धरून त्यांना गदा गदा हलविणे, व विचारणे सुरू केले. ज्यावर ह.हारून (عليه السلام) नी त्यांना इतकी सक्त वागणून देण्यापासून अडविले.

३) सू.आअराफमध्ये, ह.हारून ﷺ चे हे उत्तर नक्कल करण्यात आले आहे की, ''लोकांनी मला दुर्बल लेखले, आणि मला ठार करण्याच्या मागे लागले.'' (आ.१४२) ज्याचा अर्थ हा आहे की, ह.हारून ﷺ नी आपली जबाबदारी पूर्णपणे निभावली; आणि त्यांना समजाविण्यात आणि वत्सपुजेपासून रोकण्यांत कुठलीही हलगर्जीपणा आणि कोताई केली नाही. परंतु मामल्याला या मर्यादेपर्यंत जाऊ दिले नाही, की गृहयुद्ध सुरू होऊन जावे; कारण की, ह.हारून ﷺ च्या ठार करण्याचा अर्थ, मग त्यांच्या पुरस्कर्त्यात आणि विरोधकांत, आपसांत रक्त रंजीत टकराव झाला असता. आणि बनी इस्राईल उघडपणे, दोन गटांत विभागले गेले असते. जे एक दुसऱ्याचे रक्त पिपासू झाले असते. ह.मूसा ﷺ कारण की, स्वत: तेथे उपस्थित नव्हते. म्हणून या परिस्थितीच्या नाजुकपणापासून अजाण होते. याच आधारावर त्यांनी ह.हारून ﷺ ला फारच सुस्त म्हटले. परंतु मग खुलाशावर, ते खऱ्या अपराध्यांकडे वळले. म्हणून हा आधार घेणे बरोबर नाही, (जसे की, काही लोक करतांत.) की, मुसलमानांच्या एकजुटीच्या खातिर, शिर्कची कामे आणि (काही) निरर्थक गोष्टींना पण, सहन करून घेतले पाहिजे. कारण की, ह.हारून ﷺ नी असे केले नाही आणि तसेच त्याच्या म्हणण्याचा हा अर्थच नाही.

४) बहुतेक भाष्यकारांनी अर्रसूलने जिब्रईल ﷺ अभिप्रेत धरले आहेत. आणि अर्थ हा सांगितला आहे की, जिब्रईल ﷺ च्या घोड्याला जातांना सामरीने पाहिले; आणि त्याच्या पावलाखालील माती त्याने सांभाळून ठेवली; जिच्यांत काही स्वाभाविक संवयीच्या विरूद्ध असरात होते. या मातीची एक मूठ त्याने वितळलेल्या दागिन्यांत किंवा वासरांत टाकून दिली. तर त्याच्यातून एक प्रकारचा आवाज निघणे सुरू झाले. जो यांच्या फित्न्याला कारणीभूत होऊन गेला.

५) म्हणजे आयुष्यभर तू हेच म्हणत राहशील, माझ्यापासून दूर रहा. मला शिवू नका. कारण की याला शिवतांच, शिवणारा सुद्धां, आणि हा सामिरीपण, दोघांना ताप येऊन जाई. म्हणून हा जेव्हा कोण्या माणसाला पाही, तर लगेच ओरडून उठायचा की, 'ला मिसास'. असे म्हणतात की मग हा मनुष्यांच्या वस्तीतून निघून, जंगलात चालला गेला. जेथे जनावरांबरोबर त्याचे जीवन गेले. आणि अशाप्रकारे धडा घेण्याचा नमुना बनून राहिला. जणू लोकांना बहकविण्याकरीता जो मनुष्य जेवढे जास्त बहाणे, व कृप्त्या आणि धोकेबाजी अंगिकारेल, इहलोकात आणि परलोकांत, त्याची शिक्षापण या हिशेबाने फारच कडक आणि धडा घेण्यासारखी होईल.

६) म्हणजे परलोकाची शिक्षा याच्याशिवाय आहे. जी कुठल्याही प्रकारे भोगावीच लागेल.

७) याने ठाऊक झाले की, शिर्कची चिन्हे नष्ट करणे, किंबहुना त्यांचे नांव निशाण मिटवून टाकणे; मग त्याचा संबंध कितीही पवित्र व्यक्तित्वाशी असो, बेईज्जती नाही; जसे की, बिदअती लोक, कबरपुजक, तआज़ियापूजक, सांगत असतात. किंबहुना ही तौहीदची मन्शा आणि धार्मिक गैरतीचा तगादा आहे. जसे या घटनेत, असरुर्रसूलला, पाहण्यांत आले नाही. ज्यावर उघडपणे आत्मिक सुदैव पण प्रत्यक्ष पाहिले गेले. असे असून सुद्धा याची पर्वा केली गेली नाही. यासाठी की ते शिर्कचे साधन बनून गेले होते.

८) म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही फिरऔन आणि मूसाची गोष्ट सांगितली आहे, अशाच प्रकारे आम्ही पूर्वीच्या पैगंबरांची कैफियत आपल्याला सांगत आहोत. (कारण आपणांस ते ठाऊक होऊन जावे; आणि त्यांत ज्या बोध घेण्यासारख्या गोष्टी आहेत, त्यांना लोकांसमोर सादर करावे. कारण की लोकांनी याच्या प्रकाशांत योग्य वागणूक ठेवावी.)

९) 'नसीहत' ने अभिप्रेत कुरआन अजीम आहे. ज्याच्याने सेवक आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करतो, हिदायतला अंगिकारतो, आणि मुक्ती आणि सद्‌भाग्याचा मार्ग अनुसरतो.

१०) म्हणजे याच्यावर ईमान आणणार नाही; आणि याच्यांत जे काही समाविष्ट आहे, त्यावर अंमलबजावणी करणार नाही.

११) म्हणजे मोठा अपराध यासाठी की, त्याचे कर्मपत्र, पुण्याने रिक्त, आणि वाईट कर्मांनी परीपूर्ण असेल.

१२) ज्यापासून तो वाचू शकणार नाही. तसेच त्यापासून पळूंही शकणार नाही.

१३) 'सूर' ने अभिप्रेत तो कर्णा आहे, ज्यांत इसराफील ﷺ अल्लाहच्या हुकूमाने फुंक मारतील, तेव्हा कयामत घडून येईल. (मुसनद अहमद - १९१/२) एका आणखी हदीसमध्ये, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''इसराफील ने कर्ण्याला तोंडात धरून ठेवले आहे. (म्हणजे त्याला तोंडाला लाऊन उभा आहे.) कपाळ झुकलेले किंवा वाकविलेले आहे; पालनकर्त्याच्या हुकूमाची वाट पाहत आहेत. की, केव्हा त्यांना हुकूम दिला जावा,आणि त्याने याच्यांत फुंक मारून द्यावी.'' (तिर्मिझी) हजरत इसराफीलच्या ﷺ पहिल्या फुंकने, सर्वांना मृत्यु येऊन जाईल; आणि दुसऱ्या फुंकने, अल्लाहच्या हुकुमाने, सर्व जिवंत, आणि हशरच्या मैदानांत गोळा होऊन जातील. या महावाक्यांत, हीच दुसरी फुंक अभिप्रेत आहे.

१४) भयानकता आणि दहशतीच्या तिव्रतेने, एक दुसऱ्यांशी गुपचूप गुपचूप गोष्टी करतील.

نَحْنُ اَعْلَمُ بِمَا يَقُوْلُوْنَ اِذْ يَقُوْلُ اَمْثَلُهُمْ طَرِيْقَةً اِنْ لَّبِثْتُمْ اِلَّا يَوْمًا ﴿١٠٤﴾

जे काही ते म्हणत आहेत, त्याच्या वास्तविकतेशी आम्ही खूप वाकबगार आहोत. यांच्यात सर्वात जास्त, सन्मार्गमुख[१], म्हणत असेल, तुम्ही तर फक्त एकच दिवस राहिलात (१०४)

وَيَسْـَٔلُوْنَكَ عَنِ الْجِبَالِ فَقُلْ يَنْسِفُهَا رَبِّيْ نَسْفًا ﴿١٠٥﴾

आणि ते आपल्याला पर्वतांच्या बाबतीत प्रश्न विचारतात; तर आपण सांगून टाका की, त्यांना माझा पालनकर्ता, कण कण करून उडवून टाकीन;(१०५)

فَيَذَرُهَا قَاعًا صَفْصَفًا ﴿١٠٦﴾

आणि जमिनीला एकदम सपाट मैदान करून टाकीन (१०६)

لَّا تَرٰى فِيْهَا عِوَجًا وَّلَآ اَمْتًا ﴿١٠٧﴾

जिच्यांत तू काही न मोड तोड पाहशील, न उंच नीच (१०७)

يَوْمَئِذٍ يَّتَّبِعُوْنَ الدَّاعِيَ لَا عِوَجَ لَهٗ ۚ وَخَشَعَتِ الْاَصْوَاتُ لِلرَّحْمٰنِ فَلَا تَسْمَعُ اِلَّا هَمْسًا ﴿١٠٨﴾

ज्या दिवशी लोक पुकारणाऱ्याच्या मागे चालतील[२], ज्यांत कुठलीही वेडेवाकडे (वळण) नसेल; आणि[३] अल्लाह परम दयाळूंच्या समोर, सर्व आवाज खोल बसून जातील, शिवाय कान गोष्टीच्या, तुला काहीच ऐकू येणार नाही[४]. (१०८)

يَوْمَئِذٍ لَّا تَنْفَعُ الشَّفَاعَةُ اِلَّا مَنْ اَذِنَ لَهُ الرَّحْمٰنُ وَرَضِيَ لَهٗ قَوْلًا ﴿١٠٩﴾

त्या दिवशी शिफारस काहीही कामा येणार नाही; परंतु ज्याला रहमान आज्ञा देईल; आणि त्याच्या गोष्टीला पसंत करीन[५] (१०९)

يَعْلَمُ مَا بَيْنَ اَيْدِيْهِمْ وَمَا خَلْفَهُمْ وَلَا يُحِيْطُوْنَ بِهٖ عِلْمًا ﴿١١٠﴾

जे काही त्यांच्या मागे पुढे आहे, त्याला अल्लाहच जाणतो;आणि लोकांचे ज्ञान त्याला व्यापूं शकत नाही[६] (११०)

१) म्हणजे सर्वांत जास्त बुद्धीमान आणि समजदार. म्हणजे जगांतील जीवन त्यांना, काही दिवस किंवा घटका, दोन घटकेचे जाणवेल, ज्या प्रमाणे दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''ज्या दिवशी कयामत घडून येईल, काफिर शपथा वाहून म्हणतील की, ते (जगात) एक घटकेपेक्षा जास्त राहिले नाहीत.'' (सू.रूम-५५) हाच विषय, आणखी पण अनेक ठिकाणी, सांगण्यात आला आहे. उदाहरणार्थ, सू.फातिर-३७, सू.मोमिनून-११२,११४, सू.नाजिआत, वगैरे. अर्थ हा आहे की, परलोकाच्या आणि कधीही न संपणाऱ्या जीवनाच्या तुलनेत, जगांतील जीवन इतके अल्प आहे की, त्याची अवस्था घटका किंवा दोन घटकेपेक्षा जास्त नाही. त्यामुळे शहाणपणाचा तगादा हाच आहे की, या क्षणभंगूर जीवनाला, नेहमी कायम रहाणाऱ्या जीवनावर प्राधान्य दिले जाऊ नये.

२) म्हणजे ज्या दिवशी उंच आणि बसके पर्वत, गगनचुंबी इमारती, सर्व साफ होऊन जातील, समुद्र आणि नद्या आटून जातील. आणि सर्व पृथ्वी एक सपाट मैदान होऊन जाईल. मग एक आवाज येईल; ज्याच्यामागे सर्व लोक चालू लागतील; म्हणजे ज्याकडे तो आवाज देणारा बोलावील, तिकडे जातील.

३) म्हणजे त्या बोलाविणाऱ्यापासून, इकडे तिकडे होणार नाहीत.

४) म्हणजे संपूर्ण नि:स्तब्धता असेल; पावलांच्या चाहुलीशिवाय, आणि हळूहळू केलेल्या कानगोष्टी शिवाय, काही ऐंकू येणार नाही.

५) म्हणजे त्या दिवशी कोणाची शिफारस, कोणाला फायदा पोहोचविणार नाही; त्यांच्या शिवाय, ज्यांना रहमान (अल्लाह) शिफारस करण्याची परवानगी देईन. आणि ते पण प्रत्येकाची शिफारस करणार नाहीत, किंबहुना फक्त त्याची शिफारस करतील, ज्यांच्या बाबतीत शिफारशीला अल्लाह पसंत करेन. आणि हे, ते कोण लोक असतील ? फक्त तौहिदवाले, (फक्त एका अल्लाहला मानणारे) ज्यांच्या बाबतीत अल्लाहतआला, शिफारस करण्याची परवानगी देईल. हा विषय कुरआनांत अनेक ठिकाणी सांगण्यांत आला आहे. उदाहरणार्थ सू.नज्म-२६, सू.अंबिया-२८, सू.सबा-२३, सू.नबा-३८ आणि आयतुल कुर्सी.

६) गेल्या महावाक्यात शिफारसीसाठी जे तत्त्व वर्णन करण्यांत आले आहे, याच्यात याचे कारण आणि सबब सांगितली आहे. कारण की अल्लाहशिवाय, कोणाला पण कोणाच्याही बाबतीत, पूर्ण ज्ञान नाही की कोण किती मोठा अपराधी आहे? आणि तो या गोष्टीला पात्र आहे किंवा नाही, की त्याची शिफारस केली जाऊ शकावी? म्हणून या गोष्टीचा निर्णय पण अल्लाहतआलाच करीन की, कोण कोण लोक, पैगंबर आणि सदाचरणी लोकांच्या शिफारशीला पात्र आहेत. कारण की प्रत्येक माणसाच्या अपराधाची स्थिती आणि अहवालाला त्याच्या शिवाय कोणी जाणत नाही. आणि न जाणू शकतो.

**وَعَنَتِ الْوُجُوهُ لِلْحَيِّ الْقَيُّومِ ۖ وَقَدْ خَابَ مَنْ حَمَلَ ظُلْمًا ﴿١١١﴾**

**आणि तमाम तोंडे त्या जिवंत आणि नित्यसिद्ध अल्लाहसमोर, कमालीच्या नम्रतेने झुकलेली असतील. खचित्‌च तो बर्बाद झाला ज्याने जुलुमाचे (ओझे,) आपल्यावर लादून घेतले[१] (१११)**

**وَمَنْ يَعْمَلْ مِنَ الصَّالِحَاتِ وَهُوَ مُؤْمِنٌ فَلَا يَخَافُ ظُلْمًا وَلَا هَضْمًا ﴿١١٢﴾**

**आणि जो चांगली कामे करीन, आणि ईमानवाला पण असेल, तर त्याला कुठल्याही अत्याचाराची भीती राहणार नाही. तसेच कुठलाही हक्क मारला जाण्याची.[२] (११२)**

**وَكَذَٰلِكَ أَنْزَلْنَاهُ قُرْآنًا عَرَبِيًّا وَصَرَّفْنَا فِيهِ مِنَ الْوَعِيدِ لَعَلَّهُمْ يَتَّقُونَ أَوْ يُحْدِثُ لَهُمْ ذِكْرًا ﴿١١٣﴾**

**अशा प्रमाणे आम्ही तुझ्यावर अरबी कुरआन अवतरीत केले आहे; आणि नाना प्रकारे याच्यांत दरडावणी केली आहे. कारण की लोकांनी अल्लाहला भिऊन वागावे किंवा[३], त्यांच्या मनांत, विचारसमज तर निर्माण व्हावा.[४] (११३)**

**فَتَعَالَى اللَّهُ الْمَلِكُ الْحَقُّ ۗ وَلَا تَعْجَلْ بِالْقُرْآنِ مِنْ قَبْلِ أَنْ يُقْضَىٰ إِلَيْكَ وَحْيُهُ ۖ وَقُلْ رَبِّ زِدْنِي عِلْمًا ﴿١١٤﴾**

**बस! अल्लाह जो खरा बादशाह[५] आणि त्याचा महिमा फारच थोर आहे. तू कुरआन पढण्यात घाई करू नकोस; याच्यापूर्वी की, तुझ्याकडे वह्य केले जात आहे. की ते पूर्ण व्हावे[६]; होय! पण ही प्रार्थना कर की हे माझ्या पालनकर्त्या! मला आणखी अधिक अधिक ज्ञान दे[७]! (११४)**

१) यासाठी की, त्यादिवशी अल्लाहतआला संपूर्ण न्याय करेन. आणि प्रत्येक हक्कवाल्याला, त्याचा हक्क देववील. येथ पावेतो की एका शिंगवाल्या बकरीने, एका बिनशिंगवाल्या बकरीवर, जुलूम केला असेल, तर त्याचापण बदला देववीला जाईल. (सहीह मस्लीम मुसनद अहमद, जि.२ पृ.२३५) याचसाठी नबी ﷺ नी, याच हदीसमध्ये हे पण सांगितले आहे ''प्रत्येक हक्कवाल्याला त्याचा हक्क देऊन टाका, नाहीतर कयामतच्या दिवशी द्यावा लागेल.'' एका दुसऱ्या हदीसमध्ये सांगितले, ''जुलूमांपासून वांचा; कारण की जुलूम कयामतच्या दिवशी, अंध:काराला कारणीभूत होईल.'' (स.मुस्लीम) सर्वांत जास्त अपयशी तो माणूस असेल, ज्याने शिर्कचे ओझेपण आपल्यावर लादलेले असेल. यासाठी की शिर्क मोठा जुलूम आहे. क्षमेसाठी सुद्धा पात्र नाही.

२) अन्याय हा आहे की, त्याच्यावर दुसऱ्याच्या पापाचे ओझे पण टाकून देण्यात यावे. आणि हक्क मारणे हे आहे की, पुण्याचे प्रतिफळ कमी दिले जावे. या दोन्ही गोष्टी तेथे होणार नाहीत.

३) म्हणजे गुन्हे, निषीद्ध कामे, आणि निर्लज्जपणाची कामे करण्यापासून, परावृत्त होऊन जावे.

४) म्हणजे आज्ञापालन आणि जवळीक साधण्याची आवड किंवा मागील उम्मतींचे अहवाल आणि घटना यापासून बोध घेण्याची भावना याच्यांत निर्माण करून दे.

५) ज्याचा वायदा आणि दरडावणी सत्त्य आहे; स्वर्ग नर्क सत्य आहे. आणि त्याची प्रत्येक गोष्ट सत्त्य आहे.

६) जिब्रईल عليه السلام जेव्हा वह्य घेऊन येत, आणि ऐकवीत तेव्हा नबी ﷺ, पण लवकर लवकर बरोबर बरोबर म्हणत जात; की, कोठे कोणी भाग सुटून न जावा. अल्लाहतआलाने यापासून मना केले. आणि ताकीद दिली की, पहले लक्ष्यपूर्वक वह्याला ऐकावे; आणि त्याला पाठ करवून देणे आणि मनांत बसवून देणे, हे आमचे काम आहे; जसे की,सू. कियामामध्ये याचा खुलासा आहे.

७) म्हणजे अल्लाहतआलाजवळ, ज्ञान अधिक देण्याची प्रार्थना करीत रहावी. याच्यांत धर्मपंडितांसाठी पण बोध आहे, की त्यांनी धर्म निर्णयांत (फतवा) संपूर्ण छान बीन, आणि चिंतन व मननाने काम घ्यावे. घाई करण्यापासून वांचावे. आणि ज्ञानात वाढ होण्याच्या पद्धती अंगिकार करण्यांत कोताई करू नये. याशिवाय ज्ञानाने अभिप्रेत, कुरआन आणि हदीसचे ज्ञान आहे. कुरआनांत यालाच ज्ञान संबोधण्यांत आले आहे; आणि त्याला जाणणाऱ्यांना, 'उल्मा' (धर्मपंडित). दुसऱ्या गोष्टीचे ज्ञान, जे रोजीसाठी मिळवितो, ते सर्व कलाकौशल्य आहे, धंदेविषय ज्ञान आणि कारागिरी आहे. नबी ﷺ ज्या ज्ञानासाठी दुआ करीत असत, ते वह्य आणि पैगंबरीचेच ज्ञान आहे; जे कुरआन आणि हदीसमध्ये सुरक्षित आहे. ज्यामुळे माणसाचा संबंध, अल्लाहतआला बरोबर जोडला जातो. त्याचे चारित्र्य आणि कर्तृत्व याच्यांत सुधारणा होते. आणि अल्लाहची प्रसन्नता आणि अप्रसन्नता कशांत आहे, ते कळते. अशा दुआंमध्ये एक दुआ ही पण आहे, जी आपण ﷺ पढत असत. ''अल्लाहुम मन्फअनी बिमा अल्लमतनी व अल्लिम्मि मा यन्फऊनी व जिदनी इलमा. वल हुम्दु लिल्लाहि अला कुल्ली हाल.( इब्ने माजा) हे अल्लाह ! मला जे काही ज्ञान तू दिले आहे त्यापासून लाभ दे आणि मला ते ज्ञान दे जे मला लाभ पोहोचवेल आणि माझ्या ज्ञानात वाढ कर. प्रत्येक परिस्थितीत सर्व प्रशंसा अल्लाहसाठीच आहेत.

وَلَقَدْ عَهِدْنَآ إِلَىٰٓ ءَادَمَ مِن قَبْلُ فَنَسِىَ وَلَمْ نَجِدْ لَهُۥ عَزْمًا ﴿١١٥﴾

आम्ही पूर्वीच आदमला ताकीदी हुकूम, देऊन दिला होता; परंतु तो विसरून गेला. आणि आम्ही त्यांच्यात कोणी करारीपणा पावलो नाही[१]. ११५

وَإِذْ قُلْنَا لِلْمَلَٰٓئِكَةِ ٱسْجُدُوا۟ لِءَادَمَ فَسَجَدُوٓا۟ إِلَّآ إِبْلِيسَ أَبَىٰ ﴿١١٦﴾

आणि जेव्हा आम्ही देवदूतांना सांगितले की आदमला सजदा करा, तेव्हा इब्लीस शिवाय सर्वांनी केला. त्याने साफ नकार दिला. ११६

فَقُلْنَا يَٰٓـَٔادَمُ إِنَّ هَٰذَا عَدُوٌّ لَّكَ وَلِزَوْجِكَ فَلَا يُخْرِجَنَّكُمَا مِنَ ٱلْجَنَّةِ فَتَشْقَىٰٓ ﴿١١٧﴾

तेव्हा आम्ही म्हटले की, हे आदमा! हा तुझा आणि तुझ्या पत्नीचा शत्रु आहे; (लक्षांत ठेव की) कोठे असे होऊ नये की, तो तुम्हांस दोघांस स्वर्गातून काढून बाहेर करावे, की तू संकटांत पडून जावेस[२] ११७

إِنَّ لَكَ أَلَّا تَجُوعَ فِيهَا وَلَا تَعْرَىٰ ﴿١١٨﴾

नि:संशय येथे तर तुला हा आराम आहे की तुला उपाशी रहावे लागत नाही तसेच उघडेबंब पण (रहावे लागत नाही.) ११८

وَأَنَّكَ لَا تَظْمَؤُا۟ فِيهَا وَلَا تَضْحَىٰ ﴿١١٩﴾

आणि न तू येथे तान्हेला होतो, न उन्हापासून (तुला) त्रास होतो ११९

فَوَسْوَسَ إِلَيْهِ ٱلشَّيْطَٰنُ قَالَ يَٰٓـَٔادَمُ هَلْ أَدُلُّكَ عَلَىٰ شَجَرَةِ ٱلْخُلْدِ وَمُلْكٍ لَّا يَبْلَىٰ ﴿١٢٠﴾

परंतु शैतानाने त्याला फितवले म्हणू लागला की काय मी तुला शाश्वतीचा वृक्ष, आणि ते राज्य दाखवू, जे कधी पुरातन होणार नाही. १२०

فَأَكَلَا مِنْهَا فَبَدَتْ لَهُمَا سَوْءَٰتُهُمَا وَطَفِقَا يَخْصِفَانِ عَلَيْهِمَا مِن وَرَقِ ٱلْجَنَّةِ ۚ وَعَصَىٰٓ ءَادَمُ رَبَّهُۥ فَغَوَىٰ ﴿١٢١﴾

म्हणून या दोघांनी त्या वृक्षांतून काही खाऊन घेतले. मग त्यांना आपआपली लाज उघड होऊन गेली. आणि स्वर्गातील पाने आपल्यावर चिकटवू लागले; आदमने आपल्या पालनकर्त्याचा आज्ञाभंग केला आणि बहकून गेला[३] १२१

१) निसीयान (विसरून जाणे) प्रत्येक माणसाच्या स्वभावातच दाखल आहे. आणि इराद्याची दुर्बलता ही पण मानवी स्वभावांत आढळून येते. या दोन्ही दुर्बलताच शैतानाच्या फुसमध्ये, फसून जाण्याला कारणीभूत ठरतात. जर या दुर्बलतेमध्ये, अल्लाहच्या हुकुमाने, बंड आणि शिरजोरीची भावना, आणि अल्लाहच्या आज्ञाभंगाचा इरादा शामील नसेल तर विसरणे, आणि इराद्याच्या दुर्बलतेने होणारी चूक, शुद्ध चारित्र्य आणि पैगंबरीच्या परिपूर्णतेच्या विरोधांत नाही. कारण याच्यानंतर मनुष्य लगेच पश्चात्तापदग्ध होऊन, अल्लाहच्या समक्ष झुकून जातो. आणि तौबा आणि क्षमायाचनेत व्यस्त होऊन जातो. (जसे की ह. आदम عليه السلام नी पण केले.) ह. आदम عليه السلام ला अल्लाहने समजाविले होते, की शैतान तुझा आणि तुझ्या पत्नीचा शत्रु आहे. हा तुम्हांस (कदाचित्) स्वर्गातून काढून लावीन. हीच ती गोष्ट आहे, जिला येथे कराराने संबोधित करण्यात आले आहे. आदम عليه السلام या कराराला विसरून गेले; आणि अल्लाहतआलाने ह.आदम عليه السلام ला एका वृक्षाजवळ जाणे म्हणजे त्याचे फळ खाणे, यापासून मना केले होते. ह.आदम عليه السلام च्या मनांत ही गोष्ट होती की, ते या वृक्षाजवळ जाणार नाहीत. परंतु जेव्हा शैतानाने अल्लाहच्या शपथा वाहून, त्यांना असे भासविले की, त्याचे फळ तर असे गुणकारी आहे की, जो ते खाऊन घेतो त्याला शाश्वत जीवन आणि कायमची बादशाहत मिळते; तेव्हा ते आपल्या विचारांवर कायम राहूंशकले नाहीत. आणि या इराद्याच्या दुर्बलतेमुळे, शैतानाच्या फुसला बळी पडले.

२) हे दुर्दैव, कष्ट आणि परिश्रमाच्या अर्थांत आहे. म्हणजे स्वर्गात खाणे पिणे, पोषाख आणि रहाण्याच्या ठिकाणाची जी सवलत कुठल्याही कष्टाशिवाय प्राप्त आहे; स्वर्गातून निघून जाण्यामुळे, या चाऱ्ही गोष्टीसाठी, कष्ट परिश्रम करावे लागतील. ज्याप्रमाणे प्रत्येक माणसाला, या जगांत, या मुलभूत आवश्यकता प्राप्त करण्यासाठी, कष्ट करावे लागतात. याशिवाय फक्त आदम عليه السلام ला सांगण्यांत आले की, तू कष्टांत पडून जाशील. दोघांना सांगण्यांत आले नाही. वास्तविक फळ खाणारे आदम आणि हव्वा दोघेही होते. यासाठी की, मूळ संबोधित आदम عليه السلام च होते. तसेच मूलभूत गरजा प्राप्त करणे, सुद्धा पुरूषांचीच जबाबदारी आहे, स्त्रीची नाही. अल्लाहतआलाने स्त्रीला, या श्रमापासून वांचवून, घरच्या राणीची प्रतिष्ठा दिली आहे. परंतु आज, स्त्रीलाही अल्लाहने दिलेली प्रतिष्ठा, गुलामीचे जोखड वाटते. ज्यापासून स्वतंत्र होण्यासाठी ती उतावळी आणि प्रयत्नरत आहे. अरेरे ! शैतानी भुलावा पण किती परिणामकारक, आणि त्याचे जाल, किती सुंदर आणि मनमोहक आहे !!

३) म्हणजे वृक्षाचे फळ खाऊन आज्ञाभंग केला, त्याचा परिणाम हा झाला की, तो वांच्छित, किंवा सरळमार्गाहून बहकून गेला.

ثُمَّ اجْتَبٰهُ رَبُّهٗ فَتَابَ عَلَيْهِ وَ هَدٰى ﴿١٢٢﴾

मग त्याच्या पालनकर्त्याने त्याला निवडून घेतले आणि त्याचा पश्चात्ताप मान्य केला. आणि त्याला मार्गदर्शन केले.[१] (१२२)

قَالَ اهْبِطَا مِنْهَا جَمِيْعًا بَعْضُكُمْ لِبَعْضٍ عَدُوٌّ ۚ
فَاِمَّا يَاْتِيَنَّكُمْ مِّنِّيْ هُدًى ۙ فَمَنِ اتَّبَعَ هُدَايَ
فَلَا يَضِلُّ وَلَا يَشْقٰى ﴿١٢٣﴾

(अल्लाहतआलाने) फर्माविले तुम्ही दोघे येथून उतरून जा; तुम्ही आपसांत एक दुसऱ्याचे दुष्मण आहांत. आता जेव्हा कधी तुमच्याजवळ, माझ्याकडून हिदायत (सन्मार्ग बोध) येईल, तर त्या सन्मार्ग बोधाचे अनुकरण करावे. म्हणजे तो बहकणार नाही आणि त्रासांत पडणार नाही. (१२३)

وَمَنْ اَعْرَضَ عَنْ ذِكْرِيْ فَاِنَّ لَهٗ مَعِيْشَةً ضَنْكًا
وَّنَحْشُرُهٗ يَوْمَ الْقِيٰمَةِ اَعْمٰى ﴿١٢٤﴾

आणि (होय!) जो माझ्या स्मरणाकडून तोंड फिरवील, त्याचे जीवन तंग दस्तीत राहील[२]; आणि आम्ही त्याला कयामतच्या दिवशी आंधळा करुन उठवू[३] (१२४)

قَالَ رَبِّ لِمَ حَشَرْتَنِيْٓ اَعْمٰى وَقَدْ كُنْتُ بَصِيْرًا ﴿١٢٥﴾

तो म्हणेल की हे , माझ्या पालनकर्त्या! मला तू आंधळा बनवून का उठविलेस? वास्तविक मी पाहतांसवरता होतो (१२५)

قَالَ كَذٰلِكَ اَتَتْكَ اٰيٰتُنَا فَنَسِيْتَهَا ۚ وَكَذٰلِكَ
الْيَوْمَ تُنْسٰى ﴿١٢٦﴾

(उत्तर दिले जाईल की), अशाच प्रकारे, व्हावयांस पाहिजे होते; तू माझ्या आलेल्या महावाक्यांकडे दुर्लक्ष केलेस. आज तुझ्याकडे सुद्धा लक्ष दिले जाणार नाही (१२६)

وَكَذٰلِكَ نَجْزِيْ مَنْ اَسْرَفَ وَلَمْ يُؤْمِنْۢ بِاٰيٰتِ رَبِّهٖ ۭ
وَلَعَذَابُ الْاٰخِرَةِ اَشَدُّ وَ اَبْقٰى ﴿١٢٧﴾

आणि आम्ही असा बदला प्रत्येक त्या माणसाला देतो, जो मर्यादेच्या बाहेर जाईल; आणि आपल्या पालनकर्त्याच्या निशाण्यांवर ईमान आणणार नाही. आणि नि:संशय परलोकांतील शिक्षा फारच कडक, आणि चिरस्थायी आहे. (१२७)

اَفَلَمْ يَهْدِ لَهُمْ كَمْ اَهْلَكْنَا قَبْلَهُمْ مِّنَ الْقُرُوْنِ
يَمْشُوْنَ فِيْ مَسٰكِنِهِمْ ۭ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ
لِّاُولِي النُّهٰى ﴿١٢٨﴾ ع ٧ ١٣ ١٦

७ १३ १६ काय त्यांचे मार्गदर्शन, या गोष्टीने पण केले नाही की, आम्ही त्यांच्यापूर्वी पुष्कळशा वस्त्यांना नष्ट करून टाकले आहे, ज्यांच्या रहाण्या संवरण्याच्या जागांवरून हे चालत फिरत आहेत; नि:संशय याच्यांत बुद्धीमानांसाठी, पुष्कळशा निशाण्या आहेत (१२८)

१) याने काही लोक, आधार घेत म्हणतात की, ह.आदम (अलैहिस्सलाम) कडून चर्चित विसरणे पैगंबरीच्या पूर्वी झाले. आणि याच्यानंतर आपणाला पैगंबरी देण्यात आली. परंतु आम्ही मागील पृष्ठांत, या अपराधाची जी वास्तविकतां, वर्णन केली आहे, ती शुद्ध चारित्र्याच्या विरोधांत राहत नाही; कारण की, अशी भूल किंवा विसरणे, ज्याचा संबंध प्रचार आणि पैगंबरीशी व खुलाशाशी नसावा; किंबहुना वैयक्तिक कर्मांशी असावा, आणि याच्यांत सुद्धा, याचे कारण, इराद्याचे दौर्बल्य असेल, तर मग हा अपराधच नाही, ज्याच्या आधारावर मनुष्य अल्लाहच्या प्रकोपाला पात्र ठरतो. यावर जो अपराध (गुन्हा) यासाठी म्हटला गेला आहे की, त्यांची मोठी शान, आणि स्थानाच्या कारणामुळे; की, मोठ्यांची मामुली चूक सुद्धा, मोठी समजून घेण्यांत येते. यासाठी महावाक्याचा अर्थ हा नाही, की, आम्ही त्याच्यानंतर, त्याला पैगंबरीसाठी निवडून घेतले; किंबहुना अर्थ हा आहे की, पश्चात्ताप आणि तौबा नंतर, आम्ही त्याला पुन्हा निवडक स्थानावर आरूढ करून दिले. जे पूर्वी त्यांना मिळाले होते. त्यांना पृथ्वीवर उतारण्याचा निर्णय, आमची इच्छा, बुद्धीवर, आणि प्रयोजनावर आधारित होता. याच्याने हे न समजून घेण्यांत यावे, की ही आमची नाराजगी आहे जी आदमवर अवतरीत झाली.

२) या तंगीने काहींनी अजाबे कब्र, आणि काहींनी, ती बेकरारी, बेचैनी, आणि अस्वस्थता, अभिप्रेत धरली आहे, जिच्यांत अल्लाहच्या स्मरणाकडून गाफील, मोठे मोठे धनवान, व्यस्त असतात.

३) याच्याने अभिप्रेत खरोखरीच, डोळ्यांनी आंधळे होणे आहे. किंवा मग शहाणपण पासून वंचित रहाणे अभिप्रेत आहे. म्हणजे तेथे त्याला अशी कोणी दलील सूचणार नाही, जिला पुढे करून तो शिक्षेपासून वाचू शकेल.

आणि जर तुझ्या पालन कर्त्याची गोष्ट पहिलेच निश्चित, व एक नियमित वेळ ठरली नसती, तर याच वेळी शिक्षेने त्याला घेरले असते[१] १२९

وَلَوۡلَا كَلِمَةٌ سَبَقَتۡ مِن رَّبِّكَ لَكَانَ لِزَامًا وَأَجَلٌ مُّسَمًّى ﴿١٢٩﴾

बस! यांच्या गोष्टी सहन कर. आणि आपल्या पालनकर्त्याचे पावित्र्य आणि स्तुती वर्णन करीत रहा, सूर्योदयापूर्वी आणि सूर्यास्तापूर्वी. रात्रीच्या निरनिराळ्या वेळांत सुद्धा, आणि दिवसाच्या (काही) भागांत सुद्धा पावित्र्य वर्णन करीत रहा[२]. की कदाचित् तू खूष होऊन जाशील[३] १३०

فَاصۡبِرۡ عَلَىٰ مَا يَقُولُونَ وَسَبِّحۡ بِحَمۡدِ رَبِّكَ قَبۡلَ طُلُوعِ الشَّمۡسِ وَقَبۡلَ غُرُوبِهَاۖ وَمِنۡ ءَانَآيِٕ الَّيۡلِ فَسَبِّحۡ وَأَطۡرَافَ النَّهَارِ لَعَلَّكَ تَرۡضَىٰ ﴿١٣٠﴾

आणि आपली नजर त्या वस्तुंकडे अजीबात दौडू नकोस, ज्या आम्ही, त्यांच्यातून वेगवेगळ्या लोकांना, या इहलोकाची शोभा आणि बहारची (साधने) देऊन ठेवली आहे की, त्यांना याच्यांत कसून[४] पहावे; तुझ्या पालनकर्त्याचे दिलेले फार उत्तम, आणि फारच चिरस्थायी आहे.[५] १३१

وَلَا تَمُدَّنَّ عَيۡنَيۡكَ إِلَىٰ مَا مَتَّعۡنَا بِهِۦٓ أَزۡوَٰجًا مِّنۡهُمۡ زَهۡرَةَ الۡحَيَوٰةِ الدُّنۡيَا لِنَفۡتِنَهُمۡ فِيهِۚ وَرِزۡقُ رَبِّكَ خَيۡرٌ وَأَبۡقَىٰ ﴿١٣١﴾

आणि तू आपल्या कुटुंबाच्या लोकांवर नमाजीची ताकीद राख आणि स्वत:पण तिच्यावर (दृढ) जमून रहा[६]; आम्ही तुजजवळ अन्नसंपत्ती मागीत नाही; किंबहुना, आम्ही स्वत: तुला अन्नसंपत्ती देतो. शेवटी बोलबाला तर जे अल्लाहला भिऊन वागणारे आहेत, त्यांचाच आहे. १३२

وَأۡمُرۡ أَهۡلَكَ بِالصَّلَوٰةِ وَاصۡطَبِرۡ عَلَيۡهَاۖ لَا نَسۡـَٔلُكَ رِزۡقًاۖ نَّحۡنُ نَرۡزُقُكَۗ وَالۡعَٰقِبَةُ لِلتَّقۡوَىٰ ﴿١٣٢﴾

आणि ते म्हणाले की, हा पैगंबर, आमच्याजवळ आमच्या पालनकर्त्याकडून, कोणी निशाणी कांआणित नाही[७]? काय त्यांच्याजवळ पूर्वीच्या पुस्तकांची स्पष्ट ग्वाही पोहचली नाही[८] ? १३३

وَقَالُواْ لَوۡلَا يَأۡتِينَا بِـَٔايَةٍ مِّن رَّبِّهِۦٓۚ أَوَلَمۡ تَأۡتِهِم بَيِّنَةُ مَا فِي الصُّحُفِ الۡأُولَىٰ ﴿١٣٣﴾

आणि जर आम्ही याच्यापूर्वीच[९] त्यांना शिक्षेने नष्ट करून टाकले असते, तर खचित्च हे म्हणून पडले असते की, हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्याजवळ आपला पैगंबर का म्हणून पाठविला नाही? की आम्ही तुझ्या महावाक्यांचे आज्ञापालन केले असते; या पूर्वीच की आम्ही हीन दीन व फजीत होतो. १३४

وَلَوۡ أَنَّآ أَهۡلَكۡنَٰهُم بِعَذَابٍ مِّن قَبۡلِهِۦ لَقَالُواْ رَبَّنَا لَوۡلَآ أَرۡسَلۡتَ إِلَيۡنَا رَسُولًا فَنَتَّبِعَ ءَايَٰتِكَ مِن قَبۡلِ أَن نَّذِلَّ وَنَخۡزَىٰ ﴿١٣٤﴾

आपण सांगून द्या की प्रत्येक जण, परिणामाची वाट पहात आहे[१०]. तुम्ही सुद्धा वाट पहा; तुम्हांस लवकरच ठाऊक होऊन जाईल की, सरळ मार्गवाले कोण आहेत आणि कोण सरळ मार्ग पावलेले आहेत[११] १३५

قُلۡ كُلٌّ مُّتَرَبِّصٌ فَتَرَبَّصُواْۖ فَسَتَعۡلَمُونَ مَنۡ أَصۡحَٰبُ الصِّرَٰطِ السَّوِيِّ وَمَنِ اهۡتَدَىٰ ﴿١٣٥﴾

१) म्हणजे हे खोटे ठरविणारे, आणि मक्केचे मुशरिकीन, पाहत नाहीत की, यांच्यापूर्वी अनेक उम्मती होऊन चुकल्या आहेत. ज्यांचे हे वारसदार आहेत. आणि त्यांच्या रहाण्याच्या ठिकाणांवरून येत जात असतात; त्यांना आम्ही याच खोटे ठरविण्याच्या कारणाने नष्ट करून चुकलो आहोत. ज्यांच्या बोध घेण्यासारख्या परिणामामध्ये, बुद्धीवंतासाठी, मोठ्या निशाण्या आहेत. परंतु हे मक्केवाले, डोळे बंद करून, त्यांचीच चाल अंगिकारत आहेत. जर अल्लाहतआलाने पूर्वीपासूनच, हा निर्णय केला नसता की, तो तमाम आक्षेपांचे निर्सन केल्याशिवाय, आणि त्या मुदतीच्या येण्याअगोदर, जी तो सवलत देण्यासाठी कोण्या समाजाला देतो, कोणाला नष्ट करीत नाही. तर लगेचच त्यांना अल्लाहच्या शिक्षेने येऊन घेरले असते; आणि ते नष्ट होऊन चुकले असते. अर्थ हा आहे की, पैगंबरीला नाकारण्यावर सुद्धा, जर त्यांच्यावर आता पर्यंत शिक्षा आली नाही, तर त्यांनी असे समजू नये की, आगामी काळात पण येणार नाही. किंबहुना आता त्यांना अल्लाहकडून सवलत मिळालेली आहे; जसे की तो प्रत्येक समाजाला देतो. कर्म करण्याची सवलत, संपून गेल्यानंतर, त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वांचवणारा कोणी असणार नाही.

२) काही भाष्यकारांजवळ, 'तसबीह्' ने अभिप्रेत नमाज आहे. आणि ते याच्याने पांच नमाजी अभिप्रेत धरतात. सूर्योदयापूर्वी फज्र, सूर्यास्तापूर्वी असर, रात्रीच्या वेळांत मगरीब आणि ईशा, आणि सूर्य ढळल्यानंतर, जोहर ची नामज अभिप्रेत आहे. कारण की जोहरची वेळ, दिवसाच्या पहिल्या भागाचा शेवट आहे, आणि शेवटच्या भागाची प्रथम आहे. आणि काहीजवळ या वेळांत, तसे सुद्धा अल्लाहचे पावित्र्य आणि स्तुती करणे आहे. आणि काहीजवळ या वेळांत, ज्याच्यांत नमाज, कुरआन पठण, अल्लाहचे नाम स्मरण करणे, दुआ करणे आणि नफील नमाजी, सर्व दाखल आहेत.

३) हे संबंधित आहे 'फसब्बिह्' शी म्हणजे या वेळांत तसबीह करावी. ही आशा बाळगत की, अल्लाहजवळ आपणांस ते स्थान आणि दर्जा प्राप्त होईल, ज्यामुळे आपले मन खूष होऊन जावे.

४) हा तोच विषय आहे, जो याच्यापूर्वी, सू. आले इमरान १९६-१९७, सू.हिज्र ८७-८८, सू.कहफ-७ वगैरे मध्ये वर्णन झाला आहे.

५) याच्याने अभिप्रेत, परलोकातील बदला आणि पुण्यफळ आहे, जो जगांतील धन, साजसंरजामपेक्षा उत्तमपण आहे; आणि याच्या तुलनेत चिरस्थायी सुद्धा, हदीसे ईलाअमध्ये येते की, ह.उमर ﷺ नबी ﷺ च्या सेवेत हजर झाले. पाहिले की, आपण ﷺ एका खडबडीत चटईवर झोपले आहेत आणि घरांत काहीही चिज वस्तू नाहीत, फक्त चामड्याच्या दोन वस्तू आहेत. ह.उमर ﷺ. च्या डोळ्यांतून आपोआप अश्रू वाहू लागले. नबी करीम ﷺ नी विचारले, ''उमर काय झाले? का रडतात ?'' त्यांनी सांगितले, ''हे अल्लाहच्या रसूल ! कैसर आणि किसरा कशाप्रकारे आराम आणि सुखाचे जीवन जगत आहे. आणि आपण यावर सुद्धा की, सर्व सृष्टीत श्रेष्ठ आहांत, ही अवस्था आहे ? आपण ﷺ नी फर्माविले, ''काय तुम्ही आतांपर्यंत संशयांत आहात? हे ते लोक आहेत, ज्यांच्या आरामाच्या वस्तू जगांतच देऊन टाकण्यात आल्या आहेत.'' म्हणजे परलोकांत यांच्यासाठी काहीही असणार नाही. (स.बुखारी स. मुस्लिम)

६) या संबोधनांत संपूर्ण उम्मत, नबी करीम ﷺ चे अनुयायी आहे. म्हणजे प्रत्येक मुसलमानांसाठी आवश्यक आहे की, त्याने स्वत: नमाजीत नियमित रहावे आणि आपल्या घरांतील लोकांना सुद्धा नमाजीची ताकीद करीत रहावी.

७) म्हणजे यांच्या इच्छेप्रमाणे निशाणी, जशी समूदसाठी उंटिण जाहीर केली गेली होती.

८) याच्याने अभिप्रेत, तौरात, इंजील, जबूर वगैरे आहेत. म्हणजे काय याच्यात नबी ﷺ ची विशेषणे आढळून येत नाही. ज्यामुळे त्यांच्या पैगंबरीला मान्यता मिळते; किंवा हा अर्थ आहे की, काय यांच्याजवळ मागील लोकांचे हे अहवाल पोहोचले नाहीत की त्यांनी जेव्हा आपल्या इच्छेप्रमाणे चमत्कारांची मागणी केली, आणि तो त्यांना दाखवून देण्यात आला; परंतु असे असून सुद्धा ईमान आणले नाही; तर त्यांना नष्ट करून टाकण्यात आले.

९) अभिप्रेत शेवटच्या काळांतील पैगंबर ह.मुहम्मद रसूलुल्लाह्, ﷺ, आहेत.

१०) म्हणजे मुसलमान आणि काफिर दोघे या गोष्टीची वाट पहात आहे की, पहावे कुफ्र प्रबळ रहाते, का इस्लाम प्रबळ रहातो ?

११) याचे ज्ञान तुम्हास यापासून होऊन जाईल की, अल्लाहच्या मदतीने विजयी आणि प्रफुल्लीत कोण होतो ? हे यश मुसलमानांच्या वाट्याला आले. ज्याने स्पष्ट होऊन गेले की, इस्लामच सरळ मार्ग, आणि याला मानणारेच सन्मार्ग बोधवाले आहेत.

(٢١) سُوۡرَةُ الۡاَنۡبِيَآءِ مَكِّيَّةٌ (٧٣) آياتها ١١٢ ركوعاتها ٧

# (२१) सू. अंबिया

महावाक्ये ११२ — रुकूअ ७

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِقۡتَرَبَ لِلنَّاسِ حِسَابُهُمۡ وَهُمۡ فِىۡ غَفۡلَةٍ مُّعۡرِضُوۡنَ ۞١

लोकांच्या हिशेबाचा वेळ जवळ येऊन ठेपला,[१] तरी सुध्दा ते गफलतीत तोंड फिरवून आहेत.[२] १

مَا يَاۡتِيۡهِمۡ مِّنۡ ذِكۡرٍ مِّنۡ رَّبِّهِمۡ مُّحۡدَثٍ اِلَّا اسۡتَمَعُوۡهُ وَهُمۡ يَلۡعَبُوۡنَ ۞٢

यांच्या जवळ यांच्या पालन कर्त्याकडून, जो पण नवा नवा उपदेश येत असतो, त्याला ते खेळण्या कुदण्यांतच ऐकतात.[३] २

لَاهِيَةً قُلُوۡبُهُمۡ ؕ وَاَسَرُّوا النَّجۡوَى ۖ الَّذِيۡنَ ظَلَمُوۡا ۖ هَلۡ هٰذَاۤ اِلَّا بَشَرٌ مِّثۡلُكُمۡ ۚ اَفَتَاۡتُوۡنَ السِّحۡرَ وَاَنۡتُمۡ تُبۡصِرُوۡنَ ۞٣

त्यांची मने बिल्कुल बेपर्वा आहेत. आणि या अन्यायी लोकांनी गुपचूप गुपचूप कुजबुज केली कीं, तो (तर) तुमच्याच सारखा एक मनुष्य आहे; तर काय कारण आहे कीं, तुम्ही पाहता पाहता त्याच्या जादुत येऊन जातात.[४] ३

قٰلَ رَبِّىۡ يَعۡلَمُ الۡقَوۡلَ فِى السَّمَآءِ وَالۡاَرۡضِ ۚ وَهُوَ السَّمِيۡعُ الۡعَلِيۡمُ ۞٤

पैगंबराने म्हटले, माझा पालनकर्ता, प्रत्येक त्या गोष्टीला, जी पृथ्वी आणि आकाशांत आहे, फार चांगल्या तऱ्हेने जाणतो; तो खूपच ऐकणारा व जाणणारा आहे.[५] ४

بَلۡ قَالُوۡۤا اَضۡغَاثُ اَحۡلَامٍۢ بَلِ افۡتَرٰٮهُ بَلۡ هُوَ شَاعِرٌ ۖۚ فَلۡيَاۡتِنَا بِاٰيَةٍ كَمَاۤ اُرۡسِلَ الۡاَوَّلُوۡنَ ۞٥

इतकेच नव्हे, किंबहूना हे तर म्हणतात कीं, हे कुरआन संभ्रमात पडलेल्या विचारांचा संग्रह आहे; किंबहूना याने स्वत:च त्याला रचून घेतले आहे; किंबहुना हा कवी[६] आहे. नाही तर आमच्या समोर, हा कोणी अशी निशाणी आणता, जसे कीं पूर्वीचे पैगंबर (निशाणी सहित) पाठविले गेले होते.[७] ५

مَاۤ اٰمَنَتۡ قَبۡلَهُمۡ مِّنۡ قَرۡيَةٍ اَهۡلَكۡنٰهَا ۚ اَفَهُمۡ يُؤۡمِنُوۡنَ ۞٦

यांच्यापूर्वी जेवढ्या वस्त्यांचा आम्ही नाश केला, सर्व ईमानाने रिक्त होत्या, तर काय आता हे ईमान आणतील.[८] ६

१) हिशेबाच्या वेळेने अभिप्रेत कयामत आहे. जी प्रत्येक क्षणी, जवळ आणखी जवळ होत आहे. आणि प्रत्येक ती गोष्ट जी येणार आहे, जवळ आहे. आणि प्रत्येक माणसाचा मृत्यु, स्वत: त्याच्यासाठीच कयामत आहे. याशिवाय, निघून गेलेल्या काळाच्या दृष्टीने पण कयामत जवळ आहे; कारण कीं जेवढा काळ जाऊन चुकला आहे, बाकी राहिलेला काळ, त्याच्या पेक्षा कमी आहे.

२) म्हणजे तिच्या तयारीने बेपर्वा, जगांच्या सुखचैनींत दंग, आणि ईमानच्या तगादयाने गाफील आहे.

३) म्हणजे कुरआन जे वेळोवेळी, परिस्थितीनुरूप, आणि आवश्यकतेनुसार, नवे नवे अवतरित होत राहते; ते जरी त्यांच्याच उपदेशासाठी उतरत आहे; परंतु ते त्याला अशा प्रकारे ऐकतात, जसे हे याची थट्टामस्करी आणि खेळ करीत असावेत. म्हणजे यांच्यात, मनन व चिंतन, आणि काळजी करीत नाहींत.

४) म्हणजे पैगंबराचे मनुष्य होणे, यांच्यासाठी कबूल होण्यासारखे नाही. मग ते असे पण म्हणतात की, तुम्ही पाहत नाहीं, कीं, हा तर जादूगीर आहे. तुम्ही याच्या जादू, पाहून संवरून का फसतात?

५) तो सर्व सेवकांच्या गोष्टी ऐकतो. आणि सर्वांच्या कर्मांशी वाकबगार आहे. तुम्ही जे खोटे बोलतात त्याला तो ऐकत आहे. आणि माझ्या सत्यतेला, आणि जे आमंत्रण तुम्हास देत आहे, त्याच्या वास्तविकतेला तो खूप जाणतो.

६) ही कुजबूज करणाऱ्या अन्यायी लोकांनी, यावर पुरे केले नाही; किंबहुना म्हटले कीं हे कुरआन तर, परेशान स्वप्नासारखे, संभ्रमित विचारांचा संग्रह आहे; किंबहुना याचे स्वत:चे रचलेले आहे. किंबहुना हा कवी आहे. आणि हे कुरआन सन्मार्ग बोध नाहीं, काव्यंआहे. म्हणजे कोण्या एका गोष्टीवर ते ठाम नाहीत. दररोज एक नवीन चाल बदलता, आणि नवे नवे आरोप थोपतात.

७) म्हणजे ज्याप्रमाणे समूद करतां, उंटीण, मूसा करिता लाठी, आणि चमकदार हात, वगैरे.

८) म्हणजे यांच्यापूर्वी जेवढ्या वस्त्या आम्ही नष्ट केल्या; असे झाले नाही कीं, त्यांच्या इच्छेप्रमाणे चमत्कार दाखवून दिल्यावर, त्यांनी ईमान आणले असेल; परंतु चमत्कार पाहून सुध्दा, त्यांनी ईमान आणले नाहीं. ज्याच्या परिणामांत नष्ट होणे त्यांच्या दैवी आले. तर काय जर मक्कावाल्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे कोणी निशाणी दाखवून दिली जाईल, तर ते ईमान आणतील? नाही! मुळीच नाही!! हे पण खोटे ठरविणे आणि शेखी दाखवण्याच्या मार्गावरच नेहमीप्रमाणे चालत राहतील.

وَمَآ اَرْسَلْنَا قَبْلَكَ اِلَّا رِجَالًا نُّوْحِیْٓ اِلَيْهِمْ فَسْـَٔلُوْٓا اَهْلَ الذِّكْرِ اِنْ كُنْتُمْ لَا تَعْلَمُوْنَ ۝٧

**आणि तुझ्या पूर्वी सुध्दा आम्ही जेवढे पैगंबर पाठविले, सर्व पुरूषच होते;[१] ज्यांच्याकडे आम्ही वह्य उतारित असु; मग तुम्ही ग्रंथधारी लोकांस विचारून घ्या; जर स्वत: तुम्हास माहित नसेल.[२] ७**

وَمَا جَعَلْنٰهُمْ جَسَدًا لَّا يَاْكُلُوْنَ الطَّعَامَ وَمَا كَانُوْا خٰلِدِيْنَ ۝٨

**आणि आम्ही त्यांचे शरीर असे बनविले नव्हते कीं त्यांनी जेवण न करावे. आणि ते कायम रहाणारे पण नव्हते.[३] ८**

ثُمَّ صَدَقْنٰهُمُ الْوَعْدَ فَاَنْجَيْنٰهُمْ وَمَنْ نَّشَآءُ وَاَهْلَكْنَا الْمُسْرِفِيْنَ ۝٩

**मग आम्ही त्यांच्याशी केलेले सर्व वायदे खरे केले; त्यांना आणि ज्यांना ज्यांना आम्ही इच्छिले, त्यांना वाचवून घेतले; आणि मर्यादेच्या बाहेर जाणाऱ्यांना आम्ही नष्ट करून टाकले[४] ९**

لَقَدْ اَنْزَلْنَآ اِلَيْكُمْ كِتٰبًا فِيْهِ ذِكْرُكُمْ ؕ اَفَلَا تَعْقِلُوْنَ ۝١٠ ع١

**खचित्‌च आम्ही तुझ्याकडे पुस्तक अवतरीत केले आहे, ज्याच्यात तुमच्या करिता उपदेश आहे. काय तरी सुध्दा तुम्ही समजत नाही? १०**

وَكَمْ قَصَمْنَا مِنْ قَرْيَةٍ كَانَتْ ظَالِمَةً وَّاَنْشَاْنَا بَعْدَهَا قَوْمًا اٰخَرِيْنَ ۝١١

**आणि कित्येक वस्त्या आम्ही नष्ट करून टाकल्या;[५] ज्या फारच शिरजोर होत्या. आणि त्यांच्यानंतर आम्ही इतर लोक उठवून उभे केले. ११**

فَلَمَّآ اَحَسُّوْا بَاْسَنَآ اِذَا هُمْ مِّنْهَا يَرْكُضُوْنَ ۝١٢

**जेव्हा त्यांना आमच्या शिक्षेची चाहूल लागली, तर त्याच्यापासून पळू लागले.[६] १२**

لَا تَرْكُضُوْا وَارْجِعُوْٓا اِلٰى مَآ اُتْرِفْتُمْ فِيْهِ وَمَسٰكِنِكُمْ لَعَلَّكُمْ تُسْـَٔلُوْنَ ۝١٣

**धावपळ करु नका?,[७] आणि जेथे तुम्हाला खुशाली दिली गेली होती तेथेच परत जा. आणि आपल्या घरांकडे[८] जा. कारण की, तुमची काही पृच्छांतर केली जावे.[९] १३**

قَالُوْا يٰوَيْلَنَآ اِنَّا كُنَّا ظٰلِمِيْنَ ۝١٤

**म्हणू लागले हाय! आमचे दुर्दैव!! नि:संशय आम्हीच जालीम होतो. १४**

فَمَا زَالَتْ تِّلْكَ دَعْوٰىهُمْ حَتّٰى جَعَلْنٰهُمْ حَصِيْدًا خٰمِدِيْنَ ۝١٥

**मग तर त्यांचा हाच सावा राहिला;[१०] येथ पावेतो कीं आम्ही त्यांना मुळांतून कापून टाकलेले, आणि विझून पडलेली आग ( सारखे) करून टाकले.[११] १५**

وَمَا خَلَقْنَا السَّمَآءَ وَالْاَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا لٰعِبِيْنَ ۝١٦

**आणि आम्ही आकाश आणि पृथ्वी, आणि त्यांच्या दर्म्यानच्या वस्तुंना, हंशी खेळ करण्यासाठी निर्माण केले नाही.[१२] १६**

لَوْ اَرَدْنَآ اَنْ نَّتَّخِذَ لَهْوًا لَّاتَّخَذْنٰهُ مِنْ لَّدُنَّآ ۖ اِنْ كُنَّا فٰعِلِيْنَ ۝١٧

**जर आम्ही असाच खेळ तमाशाचा इरादा करतो, तर त्याला आपल्या कडूनच बनवून घेतले असते;[१३] जर आम्ही करणारेच असतो.[१४] १७**

بَلْ نَقْذِفُ بِالْحَقِّ عَلَى الْبَاطِلِ فَيَدْمَغُهٗ فَاِذَا هُوَ زَاهِقٌ ؕ وَلَكُمُ الْوَيْلُ مِمَّا تَصِفُوْنَ ۝١٨

**किंबहुना आम्ही स त्याला असत्यावर फेकून मारतो; मग सत्य, खोट्याचे मस्तक तोडून टाकतें; आणि ते त्याच वेळीं नाहीसे होऊन जाते;[१५] तुम्ही ज्या गोष्टी सांगता आहात, जर आम्हास असेच करावयाचेच होते त्या तुमच्यासाठी दु:खाला कारणीभूत आहेत.[१६] १८**

१) म्हणजे सर्व पैगंबर पुरूष मनुष्यें होती. न कोणी मनुष्येतर कधी पैगंबर आला तसेच न पुरूषेत्तर. जणू पैगंबरी मनुष्यांबरोबर , आणि मनुष्यांमधून सुध्दा, पुरूषांबरोबरच खास राहिली आहे. याच्याने ठाऊक झाले कीं, कोणी स्त्री पैगंबर झाली नाही. म्हणून पैगंबरीपण त्या अनिवार्य कर्तव्यामधून (फर्ज) आहे, जी स्त्रीच्या स्वाभाविक आणि नैसर्गिक, कर्म करण्याच्या वर्तूळांतून बाहेर आहे.

२) अहले जिक्र (ज्ञानी) ने अभिप्रेत ग्रंथधारी लोक आहेत, जे पूर्वीच्या आकाशी ग्रंथाचे ज्ञान बाळगत होते. त्यांना विचारून घ्या की, मागील पैगंबर जे होऊन चुकले आहेत, ते मनुष्य होते का मनुष्येतर? ते तुम्हास सांगतील की, सर्व पैगंबर मनुष्यच होते. याच्याने काही लोक 'तक्लीद'ला मान्यता घेतात. ही चूक आहे वास्तविक याच्याने तर 'तकलीद' चे मुळच कापले जाते. 'तकलीद' मध्ये काय असते? फक्त एक नक्की केलेला माणूस आणि त्याच्याकडे संबंध जोडलेल्या धर्मशास्त्राच्या आदेशाची माहिती (फिक्ह), की प्रत्येक गोष्ट, प्रत्येक समस्या, याच एका इमाम किंवा त्यांच्याशी संबंधित फिक्ह ला विचारली जावी. आणि त्यावरच अंमलबजावणी केली जावी. दुसरे असे की, पुराव्याशिवाय, या गोष्टीला मान्य केले जावे. जेव्हा की या महावाक्यात अहले जिक्र ने अभिप्रेत कोणी निश्चित माणूस नाही. किंबहुना प्रत्येक तो धर्मपंडीत आहे, जो तौरात आणि इंजीलचे ज्ञान बाळगत असेल. याच्याने विशिष्ट माणसाच्या 'तकलीदी' ला मान्यता मिळते, की ती अमान्य होते?

यांच्यात तर उल्माकडे वळण्याची ताकीद आहे. जी सर्व साधारण लोकांकरिता, आवश्यक आहे; त्याला कोणीच नकार देत नाहीं. न कोण्या एकाच व्यक्तित्वाचा पदर पकडून घेण्याचा हुकूम. याशिवाय तौरात व इंजील आकाशी पुस्तके होती का मानवांनी स्वत: तयार केलेली फिकहची पुस्तके? जर ती आकाशी पुस्तके होती, तर अर्थ हा झाला कीं, धर्मपंडितामार्फत शरीयतचे स्पष्टीकरण जाणून घ्यावे जो या महावाक्याचा खरा भावार्थ आहे. आणि जर ती एक व्यक्ती किंवा एक गुरू आणि त्याचा शिष्यांचा म्हणण्यांचा संग्रह होती, तर मग खचित्च फिकहच्या तकलीदला मान्यता या महावाक्यातून निघते. परंतु काय ते आकाशी ग्रंथ लोकांच्या म्हणण्याचा संग्रह होता?

३) किंबहुना ते जेवण पण करीत होते. आणि मृत्यू पाऊन, कायम रहाणाऱ्या जगतात पोहोचून गेले. ही पैगंबर मनुष्येच होती याची दलील, दिली जात आहे.

४) म्हणजे वायद्याप्रमाणे, पैगंबर आणि ईमानवाल्यांना वाचवून घेतले आणि मर्यादेच्या बाहेर जाणारे, म्हणजे काफिर आणि मुशरिकीन यांना आम्ही नष्ट करून टाकले.

५) कसम् चा अर्थ आहे तोडून फोडून टाकणे. आणि कम् तकशीर चा सेगा आहे. म्हणजे कित्येक वस्त्यांना आम्ही नष्ट करून टाकले. ज्या प्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले; ''नूहच्या लोकांनंतर आम्ही, कित्येक वस्त्या नष्ट करून टाकल्या.''(सू. बनी इस्राईल-१७)

६) 'अहसास'चा अर्थ आहे, चाहुली ने जाणून होणे. म्हणजे जेव्हा त्यांनी शिक्षा, किंवा तिच्या चिन्हांना, येतांना डोळ्यांनी पाहून घेतले; किंवा (वीजेची) चमक आणि (ढगांचा) गडगडाट ऐकून, समजून गेले; तर यापासून वाचण्याकरितां, पळण्याचा मार्ग शोधू लागले. 'रकजुन' चा अर्थ होतो, मनुष्य घोड्या वगैरे वर बसून, त्याला पळविण्या करितां, टांच मारतो. येथूनच तो शब्द पळून जाण्याच्या अर्थात, उपयोगांत आणला जाऊ लागला.

७) हा देवदुतांनी आवाज दिला; किंवा ईमानवाल्यांनी, उपहास करावयाचा म्हणून म्हटले.

८) म्हणजे ज्या देणग्या आणि सुखसोयी तुम्हाला मिळत होत्या, त्या तुमच्या कुफ्र आणि शिरजोरीला कारणीभूत होत्या. आणि ती घरे ज्यांत तुम्हीं राहत होते; आणि त्यांच्या सौंदर्यावर आणि कायम टिकून राहण्यावर, गर्व करीता होता, त्यांच्याकडे चला.

९) आणि शिक्षेनंतर तुमचा हाल हवाल तर विचारून घेतला जावा, की तुमच्यावर ही काय आपत्ती आली, आणि कशी काय आली कांआली? हा प्रश्न उपहास म्हणून, आणि थट्टा करावयाची म्हणून आहे. नाहीतर बर्बादीच्या पंज्यांत कसले गेल्यानंतर, ते उत्तर देण्याच्या अवस्थेतच कसे राहत होते.

१०) म्हणजे जो पर्यंत जीवनाची लक्षणे त्यांच्यांत होते. ते जुलूम केल्याची कबूली देत राहिले.

११) 'हसीद' कापणी केलेल्या शेताला, आणि 'खमूद', आगीच्या विझून जाण्याला म्हणतात. म्हणजे सरशेवटी ते कापलेले शेत आणि विझलेल्या आगी सारखे राखेचा ढीग होऊन गेले. काही जिवंत टवटवीत पणा, आणि काही हालचाल त्यांच्यात राहीली नाहीं.

१२) परंतु याचे बरेच उद्देश्य आणि प्रयोजने आहेत. उदाहरणार्थ सेवकांनी माझे स्मरण आणि आभार मानावेत पुण्यवंतांना पुण्याचा बदला, गुन्हेगारांना त्यांच्या पापांची शिक्षा दिली जावीं. वगैरे

१३) म्हणजे आपल्या जवळूनच काहीं वस्तू खेळण्यासाठी बनवून घेतल्या असल्या आणि आपली हौस भागविली असती. इतके लांब रुंद विश्व बनविण्याची आणि याच्यांत प्राणधारी आणि समज बाळगणारी सृष्टी बनविण्याची, काय आवश्यकता होतीं?

१४) दुसरे भाषांतर याचे हे आहे, ''जर आम्ही करणारच असतो'' अरबी भाषा सरणीच्या अनुषंगाने हे जास्त बरोबर आहे. (फत्हुल कदीर)

१५) म्हणजे विश्व निर्मितीच्या उद्देश्यांमधून, एक महत्त्वाचा उद्देश्य, हा आहे की, येथे सत्य आणि असत्याचा जो टकराव, भलाई आणि वाईटपणा यांच्यात जो संघर्ष आहे. यांच्यात आम्ही, सत्य आणि भलाईला प्रबळ, आणि असत्य आणि वाईटाला, पराजीत करावे. म्हणून आम्ही सत्याला असत्यावर, किंवा खऱ्याला खोट्यावर किंवा भलाईला वाईटावर मारत असतो. ज्याच्याने असत्य, खोटे आणि वाईट नाहिशे होऊन जातात. आणि पापणी लावत नाही, तेवढ्यात नामशेष होऊन जाते. दमगून डोक्यावरच्या अशा प्रहाराला म्हणतात, जी मेंदुपर्यंत पोहचून जावी. जहक:चा अर्थ, संपूर्ण जाणे, किंवा बर्बाद, आणि नष्ट होऊन जाण्याचे आहे.

१६) म्हणजे पालनकर्त्याकडे तुम्ही ज्या बिनबुडाच्या गोष्टी लावतात; किंवा त्यांच्या बाबतीत खात्रीपूर्वक सांगतात, (उदाहरणार्थ हे विश्व एक खेळ आहे. एका खिलाडीचा निरर्थक शौक आहे. वगैरे) हे तुमच्या नाशाला कारणीभूत आहे. कारण कीं याला खेळ तमाशा समजल्यामुळें तुम्ही सत्यापासून पळ काढतात; आणि निरर्थक गोष्टीला अंगीकारण्यांत, कुठलाही विचार करीत नाही, आणि भीती बाळगीत नाही. ज्याचा परिणाम सरशेवटी तुमची बर्बादी आणि नष्ट होणेच आहे.

وَلَهٗ مَنْ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۭ وَمَنْ عِنْدَهٗ
لَا يَسْتَكْبِرُوْنَ عَنْ عِبَادَتِهٖ وَلَا يَسْتَحْسِرُوْنَ ١٩

आणि आकाश आणि पृथ्वीत जे काही आहे, याच अल्लाह्चे आहे.[१] आणि जे त्याच्या जवळ आहेत,[२] ते त्याच्या उपासने पासून अहंकार करीत नाही आणि थकून ही जात नाही ⑲

يُسَبِّحُوْنَ الَّيْلَ وَالنَّهَارَ لَا يَفْتُرُوْنَ ٢٠

ते रात्रंदिवस त्याचीच पवित्रता वर्णीत असतात; आणि (त्यांत) जराशीपण सुस्ती करत नाहींत ⑳

اَمِ اتَّخَذُوْٓا اٰلِهَةً مِّنَ الْاَرْضِ هُمْ يُنْشِرُوْنَ ٢١

या लोकांनी जमिनीतून ज्यांना उपास्य बनवून ठेविले आहे, काय ते त्यांना जिवंत करून देतात?[३] ㉑

لَوْ كَانَ فِيْهِمَآ اٰلِهَةٌ اِلَّا اللّٰهُ لَفَسَدَتَا ۚ
فَسُبْحٰنَ اللّٰهِ رَبِّ الْعَرْشِ عَمَّا يَصِفُوْنَ ٢٢

जर आकाश व पृथ्वीत अल्लाहतआलाच्या शिवाय, आणखी कोणी उपास्य असते, तर दोन्हीही केव्हांच नाश पाऊन गेले असते;[४] बस! अल्लाहतआला महासिंहासनाचा रब, प्रत्येक त्या गुणांपासून पवित्र आहे, जे हे मुशरिक सांगतात. ㉒

لَا يُسْـَٔلُ عَمَّا يَفْعَلُ وَهُمْ يُسْـَٔلُوْنَ ٢٣

तो आपल्या कामांकरिता (कोणाच्या पुढे) उत्तर देय नाहीं. आणि सर्व (त्याच्यापुढें) उत्तर देणारे आहेत. ㉓

اَمِ اتَّخَذُوْا مِنْ دُوْنِهٖٓ اٰلِهَةً ۭ قُلْ هَاتُوْا بُرْهَانَكُمْ ۚ
هٰذَا ذِكْرُ مَنْ مَّعِيَ وَذِكْرُ مَنْ قَبْلِيْ ۭ بَلْ اَكْثَرُهُمْ
لَا يَعْلَمُوْنَ ۙ الْحَقَّ فَهُمْ مُّعْرِضُوْنَ ٢٤

काय या लोकांनी अल्लाह्च्या शिवाय आणखी उपास्य बनवून ठेवले आहेत, त्यांना सांगून टाका, आणा आपले प्रमाण (तर) सादर करा! हे आहे माझ्या बरोबर असलेल्यांचे प्रमाण, (कारण) आणि माझ्या पुर्वीचे पुस्तके[५] गोष्ट ही आहे की, यांच्यातून बहुतेक लोक सत्याला जाणणारे नाहीत. म्हणून तोंड फिरवून घेतात. ㉔

१) सर्व याच्या अधिन आणि याचे सेवक आहेत. मग जेव्हा तुम्ही कोण्या गुलामाला आपला मुलगा, आणि कोण्या दासीला आपली पत्नी बनवून घेण्यांस तयार होत नाही, तर अल्लाहूतआला आपल्या अधिनस्थ आणि गुलामांमधून कोणाला आपला मुलगा, आणि कोणाला आपली पत्नी, कशाप्रकारे बनवूंशकतो?

२) याच्याने अभिप्रेत देवदूत आहेत. ते पण त्याचे गुलाम आणि सेवक आहेत. या शब्दांनी त्यांची प्रतिष्ठा आणि सन्मान पण जाहीर होत आहे. कीं त्याचे दरबारांत जवळीक साधलेले आहेत; त्याच्या मुलीं नाहीत. जशी की मुशरिकीन ची श्रध्दा होती.

३) प्रश्नवाचक नकारासाठी आहे, म्हणजे करू शकत नाहीं. मग ते त्यांना जे कुठल्याही गोष्टीचा अधिकार बाळगत नाहीं, अल्लाह्चा भागीदार का ठरविता आणि त्यांची उपासना का करतात?

४) म्हणजे जर खरोखर आकाश आणि पृथ्वीत दोन उपास्य असते, तर विश्वात हेर फेर करणाऱ्या दोन व्यक्ती असत्या. दोघांचा इरादा, समज, व मर्जी, कार्यरत राहती. आणि जेव्हा दोन व्यक्तींचा इरादा आणि निर्णय, विश्वांत चालता तर ही विश्वाची व्यवस्था कायम राहूंच शकली नसती. जी विश्वाच्या सुरवातीपासून, कुठल्याही मामुली विलंबाशिवाय, चालत आली आहे. कारण कीं, दोघांचा इरादा एक दुसऱ्याच्या विरोधांत असता. दोघांच्या मर्जींचा आपसात संघर्ष झाला असता दोघांचे अधिकार एक दुसऱ्याच्या विरुध्द दिशेंत वापरले गेले असते, ज्याचा परिणाम गोंधळ आणि फसादच्या रूपांत जाहीर झाला असतां; आणि आतापर्यंत असे झाले नाहीं, तर याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं, विश्वात फक्त एकच व्यक्ती आहे, जिचा इरादा आणि मर्जी कार्यरत आहे. जे काही पण होते, फक्त आणि फक्त त्याच्याच हुकुमाने होत आहे. त्याच्या दिलेल्याला कोणी रोकूं शकत नाहीं. आणि ज्याच्यापासून तो आपली रहमत थांबवून घेईल, तिला देणारा कोणी नाहीं.

५) 'जिकरू मम् मइया' ने कुरआन आणि दुसऱ्या जिक्र ने पूर्वीचे आकाशी ग्रंथ अभिप्रेत आहेत. अर्थ हा आहे कीं, कुरआनांत आणि याच्या पूर्वीच्या दुसऱ्या पुस्तकांमध्यें, एकाच उपास्याच्या उपास्यत्वाचा आणि पालकत्वाचा उल्लेख आढळतो. परंतु हे मुशरिक लोक या सत्याला मान्य करण्याला तयार नाहींत. आणि नेहमीप्रमाणे या एकेश्वर वादापासून (तौहीद) तोंड फिरवित आहेत.

وَمَآ اَرۡسَلۡنَا مِنۡ قَبۡلِكَ مِنۡ رَّسُوۡلٍ اِلَّا نُوۡحِیۡۤ اِلَیۡهِ اَنَّهٗ لَاۤ اِلٰهَ اِلَّاۤ اَنَا فَاعۡبُدُوۡنِ ﴿۲۵﴾

आणि तुझ्यापूर्वी सुध्दा आम्ही जो पण पैगंबर पाठविला, त्याच्याकडे हेच वह्य अवतरीत केले कीं, माझ्याशिवाय अन्य कोणी खराखुरा उपास्य नाही; मग तुम्ही सर्व माझीच उपासना करा.[१] (२५)

وَ قَالُوا اتَّخَذَ الرَّحۡمٰنُ وَلَدًا سُبۡحٰنَهٗ ؕ بَلۡ عِبَادٌ مُّكۡرَمُوۡنَ ﴿۲۶﴾ۙ

आणि (मुशरिक लोक) म्हणतात कीं, रहमानची संतती आहे. (हे चूक आहे) तो पवित्र आहे; किंबहुना ते सर्व त्याचे प्रतिष्ठित सेवक आहेत. (२६)

لَا یَسۡبِقُوۡنَهٗ بِالۡقَوۡلِ وَهُمۡ بِاَمۡرِهٖ یَعۡمَلُوۡنَ ﴿۲۷﴾

कोण्या गोष्टीत ते त्याच्यापुढे पुढे बोलू शकत नाहीं. किबंहुना त्याच्या हुकूमावर अंमल बजावणी करीत असतात.[२] (२७)

یَعۡلَمُ مَا بَیۡنَ اَیۡدِیۡهِمۡ وَمَا خَلۡفَهُمۡ وَلَا یَشۡفَعُوۡنَ ۙ اِلَّا لِمَنِ ارۡتَضٰی وَهُمۡ مِّنۡ خَشۡیَتِهٖ مُشۡفِقُوۡنَ ﴿۲۸﴾

तो यांच्या पुढच्या मागच्या सर्व अहवालांचा जाणणारा आहे. ते कोणाचीही पण शिफारस करीत नाहीं, त्यांच्याशिवाय, ज्यांच्यावर अल्लाह् खूष असेल.[३] ते तर स्वत: अल्लाह्च्या धाकाने थर थर कापत असतात. (२८)

وَمَنۡ یَّقُلۡ مِنۡهُمۡ اِنِّیۡۤ اِلٰهٌ مِّنۡ دُوۡنِهٖ فَذٰلِكَ نَجۡزِیۡهِ جَهَنَّمَ ؕ كَذٰلِكَ نَجۡزِی الظّٰلِمِیۡنَ ﴿۲۹﴾ ع ٢ ١٩ ٢

आणि यांच्यातून जर कोणीसुध्दा सांगून देईल कीं, अल्लाह्च्या शिवाय मी उपासनेच्या लायक आहे; तर आम्ही त्याला नरकाग्नीची शिक्षा देऊ.[४] आम्ही जालीमांना अशाच प्रकारे शिक्षा देत असतो. (२९)

اَوَلَمۡ یَرَ الَّذِیۡنَ كَفَرُوۡۤا اَنَّ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضَ كَانَتَا رَتۡقًا فَفَتَقۡنٰهُمَا ؕ وَجَعَلۡنَا مِنَ الۡمَآءِ كُلَّ شَیۡءٍ حَیٍّ ؕ اَفَلَا یُؤۡمِنُوۡنَ ﴿۳۰﴾

काय काफिरांनी हे पाहिले[५] नाहीं कीं, आकाश आणि पृथ्वी एक दुसऱ्याशी मिळलेले जुळलेले होते; मग आम्ही त्यांना वेगवेगळे केले.[६] आणि प्रत्येक जिवंत वस्तुला आम्ही पाण्यापासून निर्माण केले.[७] काय हे लोक तरीसुद्धा ईमान आणत नाही? (३०)

وَجَعَلۡنَا فِی الۡاَرۡضِ رَوَاسِیَ اَنۡ تَمِیۡدَ بِهِمۡ ۪ وَجَعَلۡنَا فِیۡهَا فِجَاجًا سُبُلًا لَّعَلَّهُمۡ یَهۡتَدُوۡنَ ﴿۳۱﴾

आणि आम्ही पृथ्वीत पर्वत निर्माण करून दिलें. कारण कीं तिने लोकांना हलवू शकूं नये.[८] आणि आम्ही हिच्यांत[९] रूंद रूंद मार्ग बनविले कीं त्यांनी मार्गदर्शन प्राप्त करावे. (३१)

وَجَعَلۡنَا السَّمَآءَ سَقۡفًا مَّحۡفُوۡظًا ۚۖ وَّهُمۡ عَنۡ اٰیٰتِهَا مُعۡرِضُوۡنَ ﴿۳۲﴾

आणि आकाशाला मजबूत छत[१०] आम्हीच बनविले आहे. परंतु लोक त्याच्या सामर्थ्याच्या नमुन्याकडे लक्ष देत नाहीं. (३२)

وَهُوَ الَّذِیۡ خَلَقَ الَّیۡلَ وَالنَّهَارَ وَالشَّمۡسَ وَالۡقَمَرَ ؕ كُلٌّ فِیۡ فَلَكٍ یَّسۡبَحُوۡنَ ﴿۳۳﴾

आणि तोच अल्लाह् आहे ज्याने रात्र आणि दिवस, आणि सूर्य व चंद्राला निर्माण केले आहे.[११] यांच्यातून प्रत्येक आपआपल्या कक्षेत पोहंत फिरत आहे.[१२] (३३)

وَمَا جَعَلۡنَا لِبَشَرٍ مِّنۡ قَبۡلِكَ الۡخُلۡدَ ؕ اَفَا۠ئِنۡ مِّتَّ فَهُمُ الۡخٰلِدُوۡنَ ﴿۳۴﴾

आणि आपल्या पूर्वी कुठल्याही मनुष्याला आम्ही आणि कायम रहाणे प्रदान केले नाहीं, काय जर तुम्ही मरून गेलांत, तर ते सतत रहाणारे आहेत?[१३] (३४)

كُلُّ نَفۡسٍ ذَآئِقَةُ الۡمَوۡتِ ؕ وَنَبۡلُوۡكُمۡ بِالشَّرِّ وَالۡخَیۡرِ فِتۡنَةً ؕ وَاِلَیۡنَا تُرۡجَعُوۡنَ ﴿۳۵﴾

प्रत्येक जीव मृत्युची गोडी चाखणार आहे; आम्ही परीक्षा म्हणून, तुमच्यातून प्रत्येकाला बऱ्या वाईट परिस्थितीत ठेवतो.[१४] आणि तुम्ही सर्व आमच्याचकडे परतून येणार आहात.[१५] (३५)

१) म्हणजे सर्व पैगंबरदेखील ह्याच एकेश्वरवादाचा संदेश घेऊन आले.

२) यांत मुशरिक लोकांचे खंडन आहे. जे देवदुतांना अल्लाह्च्या मुली म्हणत असत. अल्लाहने सांगितले, त्या मुली नाहीत (कन्या नाहीत), त्याचे सन्मान प्राप्त सेवक आणि त्याचे आज्ञाधारक आहेत. याशिवाय पुत्र, कन्यांची आवश्यकता त्या वेळी भासते, जेव्हा उतार वयात दौर्बल्य आणि परावलंबत्वाची सुरवात होते; तर त्यावेळी संतती आधार बनते. याचसाठी संततीला, म्हातारपणाची काठी संबोधण्यांत येते. परंतु वृध्दत्व, दौर्बल्य आणि परावलंबत्व असे पुढे येणारे आजार, जे माणसाला टाकता येत नाहीं. अल्लाह्तआलाचे व्यक्तित्व या तमाम दुर्बलता आणि कमतरतेपासून पवित्र आहे. म्हणून त्याला संतती किंवा कोणत्याही आधाराची आवश्यकताच काय आहे? हेच कारण आहे की, कुरआन करीममध्यें वारंवार या गोष्टीचा खुलासा केला गेला आहे की, अल्लाह्तआलाची कोणी संतती नाहीं.

३) याच्याने ठाऊक झाले कीं, पैगंबर आणि सदाचरणी लोक यांच्याशिवाय, देवदूत पण शिफारस करतील. सही

हदीसने पण याचे समर्थन होते. परंतु ही शिफारस त्यांच्या बाबतीतच होईल, ज्यांच्या करितांअल्लाहतआला पसंत करीन आणि उघड गोष्ट आहे कीं, अल्लाहतआला, शिफारस आपल्या आज्ञाभंजक सेवकांसाठी नाहीं, परंतु काही पाप करणार आज्ञाधारक सेवक, म्हणजे ईमानवाले आणि एकेश्वर वाद्यांसाठीच पंसत करील.
४) म्हणजे या देवदुतांमधून सुध्दा कोणी उपास्य होण्याचा दावा करील, तर आम्ही त्याला सुध्दा नरकाग्नीत फेकून देऊ. उद्देश्य शिर्कचे खंडन आणि एकेश्वरवादाला मान्यता आहे. जसे '' जर रहमानची संतती असेल, तर मी सर्वात प्रथम त्याची उपासना करणाऱ्यांमधून होईल.'' (सू.जुखरूफ-८१) ''हे पैगंबरा! जर तू पण शिर्क केलेस, तर तुझी कर्मे अक्रित होऊन जातील.'' (सू.जुमर-६५)
५) याच्याने प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहणे नाहीं, मनाने पाहणे अभिप्रेत आहे. म्हणजे काय त्यांनी चिंतन आणि मनन केले नाहीं; किंवा त्यांनी जाणले नाही.
६) 'रत्क' चा अर्थ बंदचा आणि 'फत्क' चा अर्थ फाडणे, उघडणे, आणि वेगवेगळे करण्याचा आहे. म्हणजे आकाश आणि पृथ्वी, सुरवातीला, आपसांत मिळालेले, आणि एक दुसऱ्याला चिटकलेले होते. आम्ही त्यांना एक दुसऱ्यापासून वेगळे केले; आकाशांना वर करून दिले, ज्यांतून पाऊस पडतो; आणि जमिनीला आपल्या जागेवर राहू दिले. तथापि ती उपजाऊ होऊन गेलीं.
७) याच्याने अभिप्रेत जर पाऊस आणि झऱ्यांचे पाणी आहे; तरी स्पष्ट आहे कीं, याच्याने उगणे (म्हणजे वनस्पतींना अंकुर फुटणे) होते. आणि प्रत्येक प्राण्याला नवजीवन मिळते आणि जर याच्याने अभिप्रेत वीर्य बिंदू आहे, तर याच्यात ही काही शंका नाही की प्रत्येक जावंत वस्तुच्या अस्तित्वाला कारणीभूत तो पाण्याचा थेंब आहे, जो नराच्या पाठीतून निघतो, आणि मादीच्या गर्भाशयांत जाऊन स्थिर होतो.
८) म्हणजे जर पृथ्वीवर हे मोठमोठे पहाड नसते, तर जमिनीत हलणे आणि कापणे होत राहिले असते. ज्यामुळे मनुष्ये आणि जनावरे यांच्यासाठी राहण्याच्या ठिकाणाला, योग्य रहाणाऱ्यापासून, जमीन वंचित झाली असती. आम्ही पर्वतांचे ओझे तिच्यावर टाकून तिला डाम डौल होण्यापासून संरक्षित करून टाकले.
९) याच्याने अभिप्रेत जमिन किंवा पर्वत आहे. म्हणजे जमिनीत रूंद रूंद रस्ते बनवून दिले, किंवा पर्वतांत खिंडी ठेऊन दिल्यांत. ज्याच्याने एका इलाख्यातून दुसऱ्या इलाख्यात जाणे सोपे होऊन गेले. 'यहतदून' चा एक दुसरा अर्थ हा पण होऊ शकतो, कारण की यांच्यामार्फत आपल्या उपजिवीकेची साधने, आणि फायदे, प्राप्त करूंशकावे.
१०) 'सकफन महफुजन' जमिनीकरता सुरक्षित छत, ज्याप्रमाणे तंबू आणि घुमटाचे छत असतात. किंवा सुरक्षित या अर्थात की त्याला जमिनीवर पडण्या पासून रोखून धरले आहे. नाहीतर आकाश पृथ्वीवर पडून जाईल तर जमिनीची सारी व्यवस्था अस्त्यावस्थ होऊन जाईल. किंवा शैतानांपासून सुरक्षित. जसे फर्माविले, ''व हफीजना हा. मिन कुल्ली शैतान् निर्जीम.'' (सू.हिज्र - १७) आता आम्ही त्यांची (आकाशांची) धुत्कारलेल्या शैतानापासून संरक्षण केले.
११) म्हणजे रात्रीला विश्रांती आणि दिवसाला रोजी कमविण्यासाठी बनविले. सूर्याला दिवसाची निशाणी, चंद्राला रात्रीची निशाणी बनविली कीं ज्यामुळे महिन्यांची आणि वर्षांची गणती केली जाऊं शकावी; जी माणसांच्या महत्त्वाच्या गरजांमधून आहे.
१२) ज्याप्रमाणे पोहोणारा पाण्याच्या पातळीवर तरंगतो, अशाच प्रकारे चंद्र आणि सूर्य आपआपल्या कक्षेत पोहतात म्हणजे चालत फिरत रहातात.
१३) हे काफिरांच्या उत्तरांत, जे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत म्हणत असत कीं, एक दिवस त्याला मरणेच आहे. अल्लाहतआलाने फर्माविले, ''मृत्यु तर प्रत्येक माणसाला येणार आहे.'' आणि या तत्त्वाप्रमाणे खचित्च मोहम्मद रसूलुल्लाह् सल्लल्लाह् अलैहि व सल्लम पण वगळले गेले नाहीं, कारण कीं, ते पण मनुष्यच आहे. आणि आम्ही कुठल्याही मनुष्यासाठी नित्य रहाणे, ठेवलेले नाहीं, परंतु काय ही गोष्ट सांगणारे, स्वत: मरणार नाहीत? याच्याने मूर्ती पुजकांचे पण खंडन होऊन गेले. जे देवता आणि पैगंबर आणि अवलिया यांच्या नित्य जीवनाला मानतात. आणि याच आधारावर त्यांना इच्छा पूर्ती करणारे आणि संकट निवारक समजतात.
१४) म्हणजे कधी संकटे आणि कठीण परिस्थितीला टाकून, आणि ऐहीक साधन सामुग्रीची विपुलता करून, कधी आरोग्य आणि मुबलकतेच्या मार्फत, आणि कधी तंगदस्ती आणि आजारामार्फत, कधी श्रीमंती देऊन आणि कधी उपासमारीत व्यस्त करून, आम्ही आजमावितो. कारण की आम्ही पहावे कीं, आभार कोण मानतो आणि कृतघ्नता कोण दाखवितो? सहन शिलता कोण पत्करतो आणि उतावळेपणा कोण करतो? आभार आणि सहनशिलता, हे अल्लाहच्या प्रसन्नतेचा, आणि कृतघ्नता आणि उतावळेपणा हे अल्लाहच्या प्रकोपाला कारणीभूत आहेत.
१५) तेथे तुमच्या कर्मांप्रमाणे, चांगले किंवा वाईट प्रतिफल देऊ. चांगल्या कर्मवाल्यांना भलाई आणि दुसऱ्याकरता वाईट प्रतिफल मिळेल.

وَاِذَا رَاٰكَ الَّذِيْنَ كَفَرُوْٓا اِنْ يَّتَّخِذُوْنَكَ اِلَّا هُزُوًا ؕ اَهٰذَا الَّذِيْ يَذْكُرُ اٰلِهَتَكُمْ ۚ وَهُمْ بِذِكْرِ الرَّحْمٰنِ هُمْ كٰفِرُوْنَ ﴿٣٦﴾

आणि हे नास्तिक लोक जेव्हा तुला पाहतात, तुमचे हंसे उडवू लागतात की, काय हाच तो आहे, जो तुमच्या उपास्यांचा उल्लेख वाईट प्रकारे करतो; आणि ते स्वत: सुध्दा परमदयाळू (अल्लाह) च्या नामस्मरणाला बिल्कुलच नाकारणारे आहेत.[१] ३६

خُلِقَ الْاِنْسَانُ مِنْ عَجَلٍ ؕ سَاُورِيْكُمْ اٰيٰتِيْ فَلَا تَسْتَعْجِلُوْنِ ﴿٣٧﴾

मनुष्य उतावळा निर्माण केला गेला आहे. मी तुम्हांस लवकरच आपल्या निशाण्या दाखवून देईन. तुम्ही माझ्याशी घाई मांडू नका.[२] ३७

وَيَقُوْلُوْنَ مَتٰى هٰذَا الْوَعْدُ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿٣٨﴾

आणि (ते) म्हणतात की जर तुम्ही खरे आहात तर हा वायदा केव्हा आहे. ३८

لَوْ يَعْلَمُ الَّذِيْنَ كَفَرُوْا حِيْنَ لَا يَكُفُّوْنَ عَنْ وُّجُوْهِهِمُ النَّارَ وَلَا عَنْ ظُهُوْرِهِمْ وَلَا هُمْ يُنْصَرُوْنَ ﴿٣٩﴾

कदाचित की हे काफिर जाणते की, त्यावेळी हे काफिर, आगीला आपल्या चेहऱ्यापासून हटवू शकतील न आपल्या पाठीवरून; आणि त्यांची मदत पण केली जाणार नाही.[३] ३९

بَلْ تَاْتِيْهِمْ بَغْتَةً فَتَبْهَتُهُمْ فَلَا يَسْتَطِيْعُوْنَ رَدَّهَا وَلَا هُمْ يُنْظَرُوْنَ ﴿٤٠﴾

तथापि (वायद्याची घटका) यांच्याजवळ अचानक येऊन पोहचेल, आणि त्यांना थक्क करून टाकेन.[४] मग तर ते लोक तिला टाळू शकणार नाहींत: आणि न त्यांना थोडासा अवकाश दिला जाईल.[५] ४०

وَلَقَدِ اسْتُهْزِئَ بِرُسُلٍ مِّنْ قَبْلِكَ فَحَاقَ بِالَّذِيْنَ سَخِرُوْا مِنْهُمْ مَّا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ﴿٤١﴾

आणि तुझ्यापूर्वीच्या पैगंबराशी पण उपहास केला जाऊन चुकला आहे; मग उपहास करणाऱ्यावरच ती गोष्ट उलटून पडली, जिची ते टर उडवित होते.[६] ४१

قُلْ مَنْ يَّكْلَؤُكُمْ بِالَّيْلِ وَالنَّهَارِ مِنَ الرَّحْمٰنِ ؕ بَلْ هُمْ عَنْ ذِكْرِ رَبِّهِمْ مُّعْرِضُوْنَ ﴿٤٢﴾

त्यांना विचारा की, परमदयाळू (अल्लाह) पासून, दिवस रात्र कोण तुमचे संरक्षण करतो?[७] गोष्ट अशी आहे कीं, हे लोक आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करण्यापासून टाळाटाळ करणारे आहेत. ४२

१) असे असूनसुध्दा हे, रसूलुल्ला ﷺ चा उपहास आणि थट्टा करतात. ज्या प्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जेव्हा, हे पैगंबरा! मक्केचे काफिर तुला पाहतात, तर तुझी थट्टा करू लागतात. म्हणतात, काय हाच तो माणूस आहे, ज्याला अल्लाहने पैगंबर बनवून पाठविले आहे?'' (सू.फुरकान -४१)

२) हे काफिरांच्या, शिक्षेच्या मागणीच्या उत्तरांत आहे. कारण की माणसाच्या स्वभावात उतावळेपणा आणि घाई आहे. म्हणून तो पैगंबराशी सुध्दां, घाईने मागणी करू लागतो कीं, आपल्या अल्लाहला सांगून, लगेच आमच्यावर शिक्षा प्रकट करून दे. अल्लाहने म्हटले, घाई करू नका. मी लवकरच आपल्या निशाण्या तुम्हास दाखवीन या निशाण्यांनी अभिप्रेत शिक्षा पण असूं शकते आणि पैगंबराच्या सत्यतेची प्रमाणे आणि पुरावे सुध्दा.

३) याचे उत्तर 'महजुफ' आहे; म्हणजे जर हे जाणून घेते तर शिक्षेच्या मागणी साठी घाई केली नसती. किंवा खात्रीपूर्वक जाणून घेते कीं, कयामत येणार आहे; किंवा 'कुफ्र' वर कायम न रहाते; किंबहुना ईमान आणले असते.

४) म्हणजे त्यांना काही सुचणार नाही, कीं त्यांनी काय करावे?

५) कीं, त्यांनी तौबा आणि पश्चात्ताप व्यक्त करावा.

६) रसूलुल्लाह ﷺ म ची सांत्वना करण्यात येत आहे कीं, मुशरिक लोकांच्या उपहासाने आणि खोटे ठरविल्याने दु:खी होऊं नये. ही काही नवीन गोष्ट नाही. तुझ्या पूर्वी आलेल्या पैगंबरांबरोबर सुध्दा, असाच मामला केला गेला आहे. सरशेवटी तीच शिक्षा त्यांच्यावर येऊन पडली; म्हणजे तिने त्यांना घेरून घेतले. जिची ते थट्टा करीत होते. आणि जिचे घडून येणे त्यांच्याजवळ, अशक्य होते. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले. ''तुझ्या पूर्वी सुध्दा पैगंबरांना खोटे ठरविण्यांत आले. मग त्यांनी त्यांच्या खोटे ठरविण्यावर आणि त्यांना जी इजा दिली गेली, त्यावर सहनशिलता पत्करली येथ पावेतो कीं त्यांच्याजवळ आमची मदत येऊन पोहचली.'' (सू.अन्आम-३४) रसूलुल्लाह ﷺ च्या सांत्वनेबरोबर, काफिर आणि मुशरिकांसाठी यांच्यात, धमकी आणि दरडावणी सुध्दा आहे.

७) म्हणजे जे तुमचे कर्तृत्व आहे, ते तर असे आहे कीं, दिवस किंवा रात्रीच्या कुठल्याही क्षणी तुमच्यावर शिक्षा येऊ शकते! या शिक्षेपासून दिवसा आणि रात्री कोण तुमचे संरक्षण करतो? काय अल्लाहच्या शिवाय आणखी कोणी आहे, जो अल्लाहच्या शिक्षेपासून तुमचे संरक्षण करू शकेल?

أَمْ لَهُمْ آلِهَةٌ تَمْنَعُهُم مِّن دُونِنَا ۚ لَا يَسْتَطِيعُونَ نَصْرَ أَنفُسِهِمْ وَلَا هُم مِّنَّا يُصْحَبُونَ ﴿٤٣﴾

काय आमच्याशिवाय त्यांचे दुसरे उपास्य आहेत जे त्यांना संकटापासून वाचवू शकतील. कोणी पण आपली मदत स्वत: करण्याची शक्ती बाळगत नाही; आणि न कोणी आमच्याकडून, त्यांचा साथीदार केला जातो.[१] (४३)

بَلْ مَتَّعْنَا هَٰؤُلَاءِ وَآبَاءَهُمْ حَتَّىٰ طَالَ عَلَيْهِمُ الْعُمُرُ ۗ أَفَلَا يَرَوْنَ أَنَّا نَأْتِي الْأَرْضَ نَنقُصُهَا مِنْ أَطْرَافِهَا ۚ أَفَهُمُ الْغَالِبُونَ ﴿٤٤﴾

किंबहुना आम्ही त्यांना आणि त्यांच्या वाडवडिलांना, जीवनाचे साज सरंजाम दिलें, येथ पावेतो कीं, यांच्यावर मोठमोठी आयुष्ये लोटली;[२] काय ते बघत नाही कीं, आम्ही जमीनीला त्याच्या किनाऱ्याकडून जमीनीला घटवीत चालले येत आहोत.[३] आता काय तेच प्रबळ आहेत?[४] (४४)

قُلْ إِنَّمَا أُنذِرُكُم بِالْوَحْيِ ۚ وَلَا يَسْمَعُ الصُّمُّ الدُّعَاءَ إِذَا مَا يُنذَرُونَ ﴿٤٥﴾

(आपण) सांगून द्या, की, मी तर तुम्हास अल्लाहच्या वह्यमार्फत सावध करीत आहे; परंतु बहिरे लोक गोष्ट ऐकत नाहीत , जेव्हा कीं त्यांना सावध केले जाते.[५] (४५)

وَلَئِن مَّسَّتْهُمْ نَفْحَةٌ مِّنْ عَذَابِ رَبِّكَ لَيَقُولُنَّ يَا وَيْلَنَا إِنَّا كُنَّا ظَالِمِينَ ﴿٤٦﴾

आणि जर त्यांना तुझ्या पालनकर्त्याच्या कोण्या शिक्षेची (जराशीही) हवा लागून जाईल, तर बोलून उठतील, हाय, आमचे दुर्दैव! खचित्‌च आम्हीच गुन्हेगार होतो.[६] (४६)

وَنَضَعُ الْمَوَازِينَ الْقِسْطَ لِيَوْمِ الْقِيَامَةِ فَلَا تُظْلَمُ نَفْسٌ شَيْئًا ۖ وَإِن كَانَ مِثْقَالَ حَبَّةٍ مِّنْ خَرْدَلٍ أَتَيْنَا بِهَا ۗ وَكَفَىٰ بِنَا حَاسِبِينَ ﴿٤٧﴾

आणि कयामतच्या दिवशी, ठीक ठीक वजन करणारी तराजू, आम्ही (यांच्या) दर्म्यान, आणून ठेवूं मग कोणावर सुध्दा, (जरा पण) जुलूम केला जाणार नाही; आणि जर एका मोहरीच्या दाण्याबरोबर सुध्दा कर्म असेल, आम्ही त्याला आणून हजर करू आणि आम्ही हिशेब घेण्यासाठी पुरेसे आहोत.[७] (४७)

وَلَقَدْ آتَيْنَا مُوسَىٰ وَهَارُونَ الْفُرْقَانَ وَضِيَاءً وَذِكْرًا لِّلْمُتَّقِينَ ﴿٤٨﴾

आणि हे बिल्कुल सत्य आहे कीं, आम्ही मूसा व हारूनला, निर्णय करणारे तेजस्वी आणि पापांपासून वाचणारे लोकांना हितोपदेश करणारे पुस्तक प्रदान केले[८] (४८)

الَّذِينَ يَخْشَوْنَ رَبَّهُم بِالْغَيْبِ وَهُم مِّنَ السَّاعَةِ مُشْفِقُونَ ﴿٤٩﴾

ते लोक, जे आपल्या पालनकर्त्याला पाहिल्या शिवाय, त्याचा धाक बाळगतात; आणि कयामतचे भय बाळगणारे आहेत.[९] (४९)

وَهَٰذَا ذِكْرٌ مُّبَارَكٌ أَنزَلْنَاهُ ۚ أَفَأَنتُمْ لَهُ مُنكِرُونَ ﴿٥٠﴾

आणि हे शुभबोध कुरआन पण आम्हीच अवतरीत आहे, काय तरी सुध्दा त्याला तुम्ही नाकारता?[१०] (५०)

وَلَقَدْ آتَيْنَا إِبْرَاهِيمَ رُشْدَهُ مِن قَبْلُ وَكُنَّا بِهِ عَالِمِينَ ﴿٥١﴾

आणि खचित्‌च आम्ही याच्यापूर्वी इब्राहीमला याची सन्मार्गबुध्दी दिली होती;[११] आणि आम्ही त्याच्या अहवालाशी खूप[१२] वाकबगार होतो. (५१)

إِذْ قَالَ لِأَبِيهِ وَقَوْمِهِ مَا هَٰذِهِ التَّمَاثِيلُ الَّتِي أَنتُمْ لَهَا عَاكِفُونَ ﴿٥٢﴾

जेव्हा त्याने आपल्या बापाला आणि आपल्या लोकांना म्हटले की, या मूर्त्या ज्यांच्यावर तुम्ही एकनिष्टतेने जमून बसला आहात, काय आहेत?[१३] (५२)

१) याचा अर्थ आहे, '' न ते आमच्या शिक्षेपासून सुरक्षित आहेत.'' म्हणजे ते स्वत: आपल्या मदतीवर आणि अल्लाहच्या शिक्षेपासून वाचण्याला समर्थ नाहीत. मग त्यांच्याकडून यांची मदत ती काय होणार आहे; आणि ते त्यांना शिक्षेपासून कसे काय वाचवू शकतात?

२) म्हणजे त्यांचे आणि त्यांच्या वाडवडिलांचे जीवन जर ऐश आरामात घालविले गेले, तर काय हे समजतात कीं ते योग्य मार्गावर आहेत? आणि पुढे सुध्दा त्यांना काहीं होणार नाही? नाही! परंतु हा थोड्या दिवसाचा आराम, आमच्या अवकाश देण्याच्या तत्त्वाचा एक भाग आहे. यापासून कोणी धोका आणि फसवणूक मध्ये व्यस्त होऊं नये.

३) म्हणजे कुफ्रची भूमी आकसून जात आहे, आणि इस्लामचे वर्चस्व विस्तृत होत आहे. कुफ्रच्या पायाखालून वाळू

सरकत आहे. आणि इस्लामचे वर्चस्व वाढत आहे. आणि मुसलमान इलाख्यांवर इलाखे, काबीज करत चालले आहेत.
४) म्हणजे कुफ्रला आकसतांना, आणि इस्लामला वाढलेले पाहून सुध्दा, काय ते काफिर असे समजतात कीं, ते प्रबळ आहेत? प्रश्न विचारणे नकारार्थी आहे. म्हणजे ते प्रबळ नाहीत, अधीन आहेत; विजयी नाहीत, पराजीत आहेत. प्रतिष्ठित आणि ताठ मानावाले नाहीं, फटफजिती त्यांच्या दैवांत आहे.
५) म्हणजे कुरआन ऐकवून, त्यांना हितोपदेश करीत आहे, आणि हीच माझी जबाबदारी आणि पद आहे. परंतु ज्या लोकांच्या कानांना, अल्लाह्ने सत्य ऐकण्यापासून बहिरे करून टाकले, आहे, डोळ्यांवर पडदा टाकला आहे, आणि अंत:करणावर मोहोर लावून टाकली आहे, त्यांच्यावर या कुरआनाचा आणि हितोपदेशाचा काहींच परिणाम होत नाहीं.
६) म्हणजे शिक्षेचा एक हलकासा झटका, आणि थोडासा भाग पण त्यांना पोहोचेल, तर ते ओरडू लागतील, आणि अन्याय केल्याची कबुली देण्यांत लागून जातील.
७) मवाजीन, मीजान(तराजू)चे अनेक वचन आहे. कर्माचें वजन करण्यासाठी, कयामतच्या दिवशी, एक तर अनेक तराजू असतील, किंवा तराजू तर एकच असेल केवळ शानसाठी, किंवा कर्मांच्या संख्येच्या अनुषंगाने, अनेकवचनी शब्दाचा उपयोग केला गेला आहे. माणसाची कर्मे तर अशरीर आहेत, म्हणजे त्यांचे काही उघड अस्तित्व, किंवा शरीर तर नाहीं; मग वजने कसे काय होणार? हा प्रश्न आजच्या पूर्वीपर्यंत तर कदाचित् काही महत्त्व राखीत असेल; परंतु आज शास्त्रीय शोधांनी त्याला शक्य करून टाकले आहे. आता या शोधांच्या मार्फत, अशरीर आणि वजन नसलेल्या वस्तुंचे पण वजन केले जाऊं लागले आहे. जेव्हा मनुष्य या गोष्टीला समर्थ होऊन गेला आहे, तर अल्लाह्तआलासाठी या कर्मांचा जे अशरीर आहे, वजन करणे कोणते कठीण काम आहे. त्याची तर शानच ''अला कुल्ले शय्ईन कदीर.'' आहे. या शिवाय हे पण शक्य आहे कीं, माणसांना दाखविण्याकरीता, या अशरीरांना तो शरीरात बदलवून देईल; आणि मग वजन करेल. जसा कीं, हदीर्शींमध्ये काही कर्मांना शरीर दिली जातील असा आधार मिळतो. उदाहरणार्थ, कुरआनवाल्याला, कुरआन एका सुंदर तरूणाच्या रूपांत येईल, तो विचारेन तू कोण आहेस? तो म्हणेन मी कुरआन आहे, ज्याला तू रात्रींना (रात्रींच्या नमाजीत ) जागून आणि दिवसा तान्हेला राहून पढत असे. (मुसनद अहमद (२८७/५) याच्या आणखी खुलाशासाठी पहावे सु आअराफ -७ चा समास, अलकिस्त, मसदर अलमवाजीनचे वैशिष्ट्य आहे. न्याय करणारी तराजू किंवा न्याय करणाऱ्या तराजू
८) हे तौरात चे वैशिष्ट्य सांगण्यात आले आहे, जे ह. मूसा ﷺ ला देण्यात आले होते. यांच्यात सुध्दा अल्लाहला भिणाऱ्यांसाठी उपदेश होता. जसे कुरआन करीमला सुध्दां'हुदल् लिल् मुत्तकीन'(सू.बकर:- २) म्हणण्यांत आले आहे कारण कीं ज्यांच्या मनात अल्लाह्चे भय असत नाहीं, ते अल्लाहच्या पुस्तकाकडे लक्ष देत नाहीं. तर आकाशी ग्रंथ त्याच्या करतां, उपदेश आणि हिदायतचे साधन कसे बनावे? उपदेश आणि हिदायत करितांतर आवश्यक आहे की, त्याच्याकडे लक्ष दिले जावे, त्याच्यावर चिंतन आणि मनन केले जावे.
९) ही अल्लाह्ला भिणाऱ्यांची वैशिष्टयेंआहेत. जसे सू.बकर:च्या सुरवातीला आणि दुसऱ्या जागी सुध्दां, अल्लाह्ला भिणाऱ्यांच्या वैशिष्ट्यांची चर्चा आहे.
१०) हे कुरआन, जे लक्षात ठेवणाऱ्यांसाठी, स्मरण व उपदेश, आणि भलाई आणि बरकतीला कारणीभूत आहे; त्याला पण आम्हीच अवतरीत केले आहे. तुम्ही याला अल्लाह्कडून अवतीर्ण होण्याला का नाकारतात, जेव्हांकी तुम्हांला हे मान्य आहे की, तौरात हे अल्लाह्कडूनच प्रकट झालेले पुस्तक आहे.
११) याच्यापूर्वीने अभिप्रेत एक तर हे आहे कीं, ह. इब्राहिम ﷺ ला. सन्मार्ग बुध्दी किंवा शहाणपण देण्याची घटना, मूसा ﷺ ला. तौरात देण्यापूर्वीची आहे. किंवा हा अर्थ आहे कीं, इब्राहीम ﷺ ला, पैगंबरीच्या पूर्वीच, शहाणपण दिले गेले होते.
१२) म्हणजे आम्ही जाणत होतो कीं, तो या सन्मार्गबुध्दीला पात्र आहे. आणि तो याचा योग्य उपयोग करीन.
१३) 'तमासील' 'तिमसाल' चे अनेकवचन आहे. हे खरे म्हणजे कोण्या गोष्टीची हुबेहुब नक्कल करण्याला म्हणतात. जसे दगडाचा पुतळा, किंवा कागद आणि भिंत वगैरेंवर कोणाचे चित्र. या ठिकाणी अभिप्रेत त्या मूर्त्या आहेत, ज्या इब्राहिम ﷺ च्या लोकांनी, आपल्या उपास्यांच्या बनवून ठेवल्या होत्या; आणि ज्यांची ते भक्ती करत असत. आकीफ ज्याचा अर्थ आहे, कोण्या गोष्टीला आवश्यक ठरविणे, आणि त्याच्यावर झुकून, जमून बसण्याचा आहे. याच पासून 'एतेकाफ' झाला; ज्यांत मनुष्य अल्लाहच्या ईबादतसाठीं, जमून बसतो, आणि एकाग्रतेने त्याचे ध्यान करतो. येथे याच्याने अभिप्रेत मूर्तीचा आदर सन्मान व उपासना, आणि त्यांच्या स्थानांवर मुजावर (पुजारी) बनून बसणे आहे. या मुर्त्या आणि चित्रे, कबरपुजक आणि पीरपुजकांमध्ये आजकाल पण सार्वत्रिक आहेत. आणि यांना मोठ्या काळजीपूर्वक घरांमध्ये आणि दुकानांमध्ये, बरकत दायी म्हणून ठेवण्यात येते. अल्लाह्तआला त्यांना सुबुध्दी देवो! (आमीन)

قَالُوْا وَجَدْنَآ اٰبَآءَنَا لَهَا عٰبِدِيْنَ ﴿٥٣﴾

सर्वांनी उत्तर दिले कीं, आम्ही आपल्या वाडवडिलांना, यांची उपासना करतांना पावलो आहोत.[१] ५३

قَالَ لَقَدْ كُنْتُمْ اَنْتُمْ وَاٰبَآؤُكُمْ فِيْ ضَلٰلٍ مُّبِيْنٍ ﴿٥٤﴾

आपण सांगितले, मग तर तुम्ही आणि तुमचे वाडवडील, धडधडीत मार्गभ्रष्टात पडून राहिलांत ५४

قَالُوْٓا اَجِئْتَنَا بِالْحَقِّ اَمْ اَنْتَ مِنَ اللّٰعِبِيْنَ ﴿٥٥﴾

ते म्हणू लागले, काय आपण आमच्या बरोबर खरोखर सत्य घेऊन आला आहांत, कांअशीच थट्टा मस्करी करीत आहात..[२] ५५

قَالَ بَلْ رَّبُّكُمْ رَبُّ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ الَّذِيْ فَطَرَهُنَّ ۖ وَاَنَا عَلٰى ذٰلِكُمْ مِّنَ الشّٰهِدِيْنَ ﴿٥٦﴾

आपण सांगितले नाही, नाही! वास्तविक तुम्हा सर्वांचा पालनकर्ता, तर तो आहे, जो आकाश आणि पृथ्वीचा मालक आहे, ज्याने त्यांना निर्माण केले आहे. मी तर याच गोष्टीचा साक्षीदार आणि त्याला मान्य करणारा आहे.[३] ५६

وَتَاللّٰهِ لَاَكِيْدَنَّ اَصْنَامَكُمْ بَعْدَ اَنْ تُوَلُّوْا مُدْبِرِيْنَ ﴿٥٧﴾

आणि अल्लाह शपथ! मी तुमच्या या उपास्यांबरोबर एक चाल चालेन. जेव्हा की तुम्ही मागे वळून चालू लागाल.[४] ५७

فَجَعَلَهُمْ جُذٰذًا اِلَّا كَبِيْرًا لَّهُمْ لَعَلَّهُمْ اِلَيْهِ يَرْجِعُوْنَ ﴿٥٨﴾

मग त्याने या सर्वांचे तुकडे तुकडे करून टाकले, पण फक्त एका मोठ्या मूर्तीला सोडून दिले; हे ही याच्याच साठी, त्या सर्वांनी त्याच्याचकडे[५] पालटावे. ५८

قَالُوْا مَنْ فَعَلَ هٰذَا بِاٰلِهَتِنَآ اِنَّهٗ لَمِنَ الظّٰلِمِيْنَ ﴿٥٩﴾

ते म्हणू लागले कीं, आमच्या उपास्यांशी हे कोणी केले? असा मनुष्य तर खचित्‌च जालीमांमधून आहे.[६] ५९

قَالُوْا سَمِعْنَا فَتًى يَّذْكُرُهُمْ يُقَالُ لَهٗٓ اِبْرٰهِيْمُ ﴿٦٠﴾

ते म्हणाले की आम्ही एका तरूणाला त्यांची चर्चा करतांना ऐकले होते, ज्याला इब्राहीम म्हणण्यांत येते.[७] ६०

قَالُوْا فَاْتُوْا بِهٖ عَلٰٓى اَعْيُنِ النَّاسِ لَعَلَّهُمْ يَشْهَدُوْنَ ﴿٦١﴾

सर्वांनी म्हटले, बरे तर त्याला गर्दीत, लोकांच्या समोर आणा, की सर्वांनी (त्याला) पहावे.[८] ६१

१) ज्याप्रमाणे आजसुध्दा अडाणीपणा आणि निरर्थक गोष्टींत फसलेल्या मुसलमानांना बिदअत व अडाणी रस्मापासून रोकले जाईल, तर ते उत्तर देतात कीं, आम्ही त्यांना कशाप्रकारे सोडावे; जेव्हांकी आमचे वाडवडील सुध्दा हेच काही करत राहिले आहेत. आणि हेच उत्तर ते मुकल्लदीन पण देतात, जे कुरआनाच्या स्पष्ट महावाक्यांना आणि सुन्नतला आक्षेप घेऊन, आपले इमाम आणि त्यांच्याशी संबंधित फिकहला चिकटून रहाणे आवश्यक आहे, असा विचार करत असतात.

२) हे यासाठी म्हटले कीं, त्यांनी याच्यापूर्वी एकेश्वरवादाचा हा आवाजच ऐकला नव्हता. त्यांनी विचार केला, असा तर नाही; की इब्राहीम عليه السلام आमच्या बरोबर थट्टा मस्करी करीत आहेत?

३) म्हणजे मी थट्टा करीत नाहीं, किंबहुना एक अशी गोष्ट सादर करीत आहे, ज्याचे ज्ञान आणि खात्री (प्रत्यक्ष अनुभवणे) मला प्राप्त झाले आहे; आणि ते हे कीं, तुमचा उपास्य, या मूर्त्या नाहीत; किंबहुना तो पालनकर्ता आहे, जो आकाश आणि पृथ्वीचा मालक, आणि त्यांचा निर्माणकर्ता आहे.

४) हे इब्राहीम عليه السلام नी आपल्या मनांत विचार करून ठरविले. काही म्हणतात कीं, हे हळूंच म्हटले. ज्याने उद्देश्य, काही लोकांना ऐकविणे होते.

५) म्हणून ज्या दिवशी ते आपली ईद, किंवा कोणी उत्सव साजरा करीत असत, सारे लोक त्यादिवशी, त्यासाठी, बाहेर चालले गेले. आणि इब्राहीम عليه السلام नी संधीचा फायदा घेत, त्यांना तोडून फोडून टाकले. फक्त एक मोठी मूर्ती सोडून दिली. काही म्हणतात कीं कुऱ्हाड तिच्या हातात धरवून दिली. कारण कीं त्यांनी तिला विचारावे.

६) म्हणजे जेव्हा ते उत्सवातून मोकळे होऊन आले, तेव्हा पाहिले कीं, उपास्य तर तुटून पडले आहेत. तेव्हा म्हणू लागले कीं, हा कोणी मोठा जालीम मनुष्य आहे, ज्याने हा प्रयत्न केला आहे.

७) यांच्यातून काहींनी म्हटले कीं, तो इब्राहिम नावाचा तरूण आहे ना, तो आमच्या मुर्तींच्या विरूध्द गोष्टी करतो, असे वाटते हे त्याचेच कारस्थान आहे.

८) म्हणजे त्याला शिक्षा होतांना लोकांनी पहावे; म्हणजे पुढे कोणी असे काम करू नये. किंवा हा अर्थ आहे कीं, लोकांनी साक्ष द्यावी कीं, त्यांनी इब्राहीम عليه السلام ला मूर्त्या तोडतांना पाहिले, किंवा त्यांच्या विरूध्द गोष्टी करतांना ऐकले आहे.

قَالُوٓا۟ ءَأَنتَ فَعَلۡتَ هَٰذَا بِـَٔالِهَتِنَا يَٰٓإِبۡرَٰهِيمُ ﴿٦٢﴾

**ते म्हणू लागले, हे इब्राहिम! काय तू आमच्या उपास्य देवांशी हे वर्तन केले आहेस? ६२**

قَالَ بَلۡ فَعَلَهُۥ كَبِيرُهُمۡ هَٰذَا فَسۡـَٔلُوهُمۡ إِن كَانُوا۟ يَنطِقُونَ ﴿٦٣﴾

**त्यांनी उत्तर दिले कीं, हे कृत्य यांच्यातील मोठ्याने केले आहे. तुम्ही आपल्या उपास्य देवांना विचारून घ्या, जर ते बोलत असतील.[१] ६३**

فَرَجَعُوٓا۟ إِلَىٰٓ أَنفُسِهِمۡ فَقَالُوٓا۟ إِنَّكُمۡ أَنتُمُ ٱلظَّٰلِمُونَ ﴿٦٤﴾

**यावर ते लोक आपल्या मनोमनी संतुष्ट झाले आणि म्हणू लागले की खरोखर जुल्मी तर स्वत: तुम्हीच आहात.[२] ६४**

ثُمَّ نُكِسُوا۟ عَلَىٰ رُءُوسِهِمۡ لَقَدۡ عَلِمۡتَ مَا هَٰٓؤُلَآءِ يَنطِقُونَ ﴿٦٥﴾

**मग डोकी वाकवून (आणि म्हणू लागले) हे तर तुला पण ठाऊक आहे कीं, हे बोलणारे नाहींत.[३] ६५**

१) म्हणून ह. इब्राहीम عليه السلام ला सर्व साधारण लोकांच्या जमावाकडे आणण्यांत आले. आणि त्यांना विचारण्यांत आले,ह. इब्राहिम عليه السلام नी उत्तर दिले कीं, हे काम तर या मोठ्या मूर्तीने केले आहे. जर या (भंगलेल्या मूर्ती) बोलू शकत असतील तर जरा त्यांना विचारा तर खरे! हे त्यांनी केवळ उपहासात्मक म्हणून म्हटले; की त्यांनी ही गोष्ट जाणून घ्यावी कीं, जे न बोलू शकतात आणि कोण्या गोष्टीची सूचना पण देण्याचे सामर्थ्य पण बाळगत नाही, तो उपास्य होऊ शकत नाही. आणि त्याला उपास्य ठरविणे पण योग्य नाही. एका सहीह हदीस मध्ये, ह. इब्राहिम عليه السلام च्या या म्हणण्याला 'बल् फअलहु कबीरूहुम्' ला खोट्या शब्दाने संबोधित केले गेले आहे. की इब्राहिम عليه السلام तीन वेळा खोटे बोलले; दोन अल्लाह् करीता, एक 'इन्नी सकीम;' आणि दुसरे हेच आणि तिसरे ह. सारा, आपल्या पत्नीला, बहीण म्हणणे. (स.बुखारी) वर्तमान काळातील काही भाष्यकाराने. या सहीह हदीशीला, कुरआनाच्या विरूध्द ठरवून, तिला नाकारले आहे. आणि ती योग्य असल्याच्या आग्रहाला, अतिशयोक्ती आणि रिवायत परस्ती ठरविले आहे. परंतु, त्यांचे हे मत बरोबर नाहीं. खचित्च वास्तविकतेच्या अनुषंगाने, त्यांना खोटे म्हटले जाऊं शकत नाही परंतु उघड स्वरूपानुसार त्यांना खोट्या पासून सुध्दा, काढले जाऊ शकत नाही, जरी हे खोटे अल्लाह्च्या जवळ, पकडीला योग्य नाहीं. कारण कीं ते अल्लाह्साठीच बोलण्यांत आले आहेत. वास्तविक कुठलेच गुन्हयाचे काम अल्लाहसाठी असूंशकत नाहीं. आणि हे तेव्हाच होऊ शकते कीं, उघडरित्या, खोटे असून सुध्दा, ते वास्तविक खोटे नसावे. ''हसनातुल अबरार व सय्य आतुल मकरबैन'' च्या अंतर्गत त्याला खोटे ठरविण्यांत आले. जसे ह. आदम अ. साठीं, 'असा (नाफरमानी) आणि गवा' (बहकून गेलेला) चे शब्द वापरले गेले आहेत. वास्तविक खुद्द कुरआनामध्येच त्यांच्या, निषिध्द वृक्षाच्या फळातून खाण्याच्या कामाला विसरून जाणे आणि इराद्याची दुर्बलता सांगण्यात आली आहे. ज्याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं, कोण्या कर्माच्या दोन बाजू पण असू शकतात. एका प्रकारे यांच्यात पसंत करणे आणि एक प्रकारे उघड दोष असणे, याची पण बाजू असावी. ह. इब्राहीम عليه السلام चे हे म्हणणे, या बाजुने उघडरित्या खोटेच आहे, कीं हे घटनेच्या विरूध्द होते. मूर्त्यांना त्यांनी स्वत:च तोडले होते; परंतु त्याला मोठया मूर्त्यांशी संबंधित केले. परंतु त्यांचा उद्देश्य दोष निर्देशन आणि एकेश्वरवादाला सिध्द करणे, हा होता, म्हणून वास्तविकतेच्या अनुषंगाने, आम्ही त्याला खोट्या ऐवजी, तर्क वितर्काची एक पध्दत, आणि मुशरिक लोकांच्या अक्कलशुन्यतेचा पुरावा आणि प्रदर्शनाचे एक ढंग म्हणू. याशिवाय हदीसीमध्यें या खोट्या गोष्टींचा उल्लेख, ज्या संदर्भात आला आहे. तो पण विचार करण्यासारखा आहे. आणि तो आहे, हशरच्या मैदानांत अल्लाहच्या समक्ष जाऊन शिफारस करण्याला, यासाठी आक्षेप होणे, कीं, त्यांच्याने इहलोकांत, तीन प्रसंगी, कुचराई घडलेली आहे. वास्तविक त्या कुचराई नाहीत. म्हणजे वास्तव आणि उद्देश्या अंतर्गत ते असत्य नाहीं. परंतु ते अल्लाह्ची महत्ता आणि दबदब्यामुळें, इतके भयभित असतील कीं, या गोष्टी खोट्या म्हणून उघड दिसत असल्याने, पकड करण्यासारख्या म्हणून दिसू लागतील. जणू या हदीसचा उद्देश्य, ह. इब्राहिम عليه السلام ला. खोटे सिध्द करण्याचा मुळीच नाहीं. परंतु त्या वस्तुस्थितीला जाहीर करणे आहे, जी कयामतच्या दिवशी ईशभयामुळें, त्यांच्यावर लागू होईल.

२) ह. इब्राहीम عليه السلام च्या या उत्तरामुळे, ते विचारांत पडून गेले; आणि एक दुसऱ्याला ते, निरूत्तर होऊन, म्हणू लागले कीं खरोखर जुलमी तर तुम्हीच आहांत; जो आपल्या जीवाला त्रासापासून वाचविण्यास आणि नुकसान करणाऱ्याचा हात धरून ठेवण्यावर समर्थ नाहीत, तो भक्तीला कसा काय पात्र होऊं शकतो? काहींनी हा अर्थ सांगितला आहे कीं, उपास्यांच्या संरक्षणांत कमी केल्या बद्दल, एक दुसऱ्याची निर्भत्सना केली. आणि संरक्षण न केल्यामुळे, एक दुसऱ्याला जालीम म्हटले.

३) मग हे इब्राहीमा! तू आम्हास असे का सांगत आहे कीं, ''यांना विचारा, जर हे बोलू शकतात?'' जेव्हा तू चांगल्याप्रकारे जाणतो की, हे बोलण्याच्या शक्तीपासून वंचित् आहेत.

قَالَ أَفَتَعْبُدُونَ مِن دُونِ اللَّهِ مَا لَا يَنفَعُكُمْ شَيْئًا وَلَا يَضُرُّكُمْ ﴿٦٦﴾

(अल्लाहच्या मित्राने त्याचवेळी) सांगितले, (तुम्हावर) खेद आहे! काय तुम्ही अल्लाहच्या शिवाय त्यांची उपासना करतात, जे तुम्हास काही न नफा पोहचवू शकतात, न नुकसान ६६

أُفٍّ لَّكُمْ وَلِمَا تَعْبُدُونَ مِن دُونِ اللَّهِ ۖ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿٦٧﴾

धिक्कार आहे तुमच्यावर, आणि त्यांच्यावर, ज्यांची तुम्ही अल्लाहच्या शिवाय पुजा करीतात; काय तुम्हाला एवढी सुध्दांअक्कल नाही.(१) ६७

قَالُوا حَرِّقُوهُ وَانصُرُوا آلِهَتَكُمْ إِن كُنتُمْ فَاعِلِينَ ﴿٦٨﴾

म्हणू लागले कीं याला जाणून टाका. आणि आपल्या उपास्य देवांची मदत करा, जर तुम्हास काही करावयाचेच असेल तर(२) ६८

قُلْنَا يَا نَارُ كُونِي بَرْدًا وَسَلَامًا عَلَىٰ إِبْرَاهِيمَ ﴿٦٩﴾

आम्ही फर्माविले हे अग्नी! तू थंड होऊन जा, आणि इब्राहिमा करीता संरक्षण आणि (आरामाची वस्तू) बनून जा. ६९

وَأَرَادُوا بِهِ كَيْدًا فَجَعَلْنَاهُمُ الْأَخْسَرِينَ ﴿٧٠﴾

आणि जरी त्यांनी इब्राहीमचे वाईट इच्छिले, परंतु आम्ही त्यांनाच नुकसान पावणारे करून टाकले ७०

وَنَجَّيْنَاهُ وَلُوطًا إِلَى الْأَرْضِ الَّتِي بَارَكْنَا فِيهَا لِلْعَالَمِينَ ﴿٧١﴾

आणि आम्ही इब्राहीम आणि लूतला, वाचवून त्या जमिनीकडे घेऊन चाललो, जिच्यात आम्ही सकल जगाच्या लोकांसाठी बरकत देऊन ठेवली होती.(३) ७१

وَوَهَبْنَا لَهُ إِسْحَاقَ وَيَعْقُوبَ نَافِلَةً ۖ وَكُلًّا جَعَلْنَا صَالِحِينَ ﴿٧٢﴾

आणि आम्ही त्याला इस्हाक दिला आणि यावर आणखी जास्त, याकूब दिला.(४) आणि प्रत्येकास आम्ही सदाचरणी बनविले. ७२

وَجَعَلْنَاهُمْ أَئِمَّةً يَهْدُونَ بِأَمْرِنَا وَأَوْحَيْنَا إِلَيْهِمْ فِعْلَ الْخَيْرَاتِ وَإِقَامَ الصَّلَاةِ وَإِيتَاءَ الزَّكَاةِ ۖ وَكَانُوا لَنَا عَابِدِينَ ﴿٧٣﴾

आणि आम्ही त्यांना लोकांचे इमाम बनवून टाकले की आमच्या हुकूमाने लोकांना मार्गदर्शन करावे, आणि आम्ही त्यांच्याकडे चांगली कामे करणे, आणि नमाजींना कायम करणे, आणि जकात देण्याचे वह्य केले; आणि ते सर्वच्या सर्व आमची उपासना करणारे सेवक होते. ७३

وَلُوطًا آتَيْنَاهُ حُكْمًا وَعِلْمًا وَنَجَّيْنَاهُ مِنَ الْقَرْيَةِ الَّتِي كَانَت تَّعْمَلُ الْخَبَائِثَ ۗ إِنَّهُمْ كَانُوا قَوْمَ سَوْءٍ فَاسِقِينَ ﴿٧٤﴾

आणि आम्ही लूतला पण बुध्दीचातुर्य आणि ज्ञान दिले. आणि त्याला त्या वस्तीतून सुटका करून दिली, जेथील लोक घाणेरड्या कामांत व्यस्त होते; आणि ते अत्यंत वाईट गुन्हेगार होते. ७४

१) म्हणजे जेव्हा ते स्वत: त्यांच्या लाचारीच्या मान्य करण्याला भाग पडले, तर मग त्यांच्या अक्कलशुन्यतेवर, खेद व्यक्त करीत म्हटले कीं, अल्लाहला सोडून अशा लाचारांची तुम्ही उपासना करता?

२) ह. इब्राहिम عليه السلام नी अशा प्रकारे जेव्हांआपला तर्क पूर्ण केला. आणि त्यांच्या आडमार्गी भटकण्याला अशा प्रकारे स्पष्ट करून दिले कीं, ते निरूत्तर होऊन गेलेत, तेव्हा कारण कीं ते हिदायच्या सुबुध्दी पासून वंचित होते, आणि कुफ्र शिर्कने त्यांच्या अंत:करणाला तेजहीन करून टाकले होते; म्हणून ते शिर्क पासून पश्चात्ताप व्यक्त करण्याऐवजी, उलट ह. इब्राहीम عليه السلام च्या विरूध्द कडक पाऊले उचलण्यास तयार होऊन गेलेत. आणि आपल्या उपास्यांचा पक्ष घेत, त्यांना आगीत फेकून देण्याची तयारी सुरू केली. मग आगीचा एक मोठा ढीग तयार केला गेला; आणि यांच्यात ह. इब्राहीम عليه السلام ला , असे म्हणतात कीं, गोफणीच्या सहाय्याने फेकून दिले. परंतु अल्लाहतआलाने आगीला हुकूम दिला कीं, इब्राहीमसाठी थंड आणि संरक्षण करणारी बनून जा. उल्मा म्हणतात कीं, जर अल्लाहतआलाने थंड च्या बरोबर संरक्षण करणारी, म्हटले नसते, तर हिचा गारवा इब्राहीम عليه السلام साठी सहन करण्याच्या पलीकडे राहिला असतां. तथापि हा एक फार मोठा चमत्कार आहे, जो, आकाशापर्यंत पोहचलेली, धगधगणारी आग, फुलांची बाग बनून जाण्याच्या स्वरूपांत, ह. इब्राहीम عليه السلام साठी, अल्लाहच्या मर्जीने, जाहीर झाली. अशाप्रकारे अल्लाहने आपल्या सेवकाला, शत्रुंच्या कारस्थानापासून वाचवून घेतले.

३) याच्याने अभिप्रेत, बहुतेक भाष्यकारांजवळ, सीरिया हा देश आहे. ज्याला सुपिकता फळफळावळ, आणि पाण्याच्या पाटांच्या विपुलतेने, तसेच पैगंबरांच्या रहाण्याच्या ठिकाण होण्याचे अनुषंगाने, बरकतवाले (आशीर्वादीत) म्हटले गेले आहे.

४) 'नाफिला' अतिरिक्तला म्हटले जाते; म्हणजे इब्राहीम عليه السلام नी तर फक्त पुत्रासाठी प्रार्थना केली होती; आम्ही मागितल्या शिवाय, आणखी जास्त नातू पण अर्पण करून दिला.

وَاَدۡخَلۡنٰهُ فِىۡ رَحۡمَتِنَا‌ ؕ اِنَّهٗ مِنَ الصّٰلِحِيۡنَ ﴿۷۵﴾

आणि आम्ही लूतला आपल्या दयेत दाखल करून घेतले, नि:संशय तो सदाचरणी लोकांमधनू होता.[१] ७५

وَنُوۡحًا اِذۡ نَادٰى مِنۡ قَبۡلُ فَاسۡتَجَبۡنَا لَهٗ فَنَجَّيۡنٰهُ وَاَهۡلَهٗ مِنَ الۡكَرۡبِ الۡعَظِيۡمِ‌ۚ ﴿۷۶﴾

आणि नूहच्या त्या वेळेची आठवण करा, जेव्हा की त्याने यापूर्वी प्रार्थना केली; आम्ही त्याची प्रार्थना मान्य केली; आणि त्याला आणि त्याच्या घरातील लोकांना, मोठ्या संकटातून वाचवून घेतले. ७६

وَنَصَرۡنٰهُ مِنَ الۡقَوۡمِ الَّذِيۡنَ كَذَّبُوۡا بِاٰيٰتِنَا‌ ؕ اِنَّهُمۡ كَانُوۡا قَوۡمَ سَوۡءٍ فَاَغۡرَقۡنٰهُمۡ اَجۡمَعِيۡنَ‏ ﴿۷۷﴾

आणि जे लोक आमच्या निशाण्यांना खोटे म्हणत होते, त्यावर आम्ही त्याची मदत केली. खचितच ते फार वाईट लोक होते. मग आम्ही त्या सर्वांना बुडवून टाकले. ७७

وَدَاوٗدَ وَسُلَيۡمٰنَ اِذۡ يَحۡكُمٰنِ فِى الۡحَـرۡثِ اِذۡ نَفَشَتۡ فِيۡهِ غَنَمُ الۡقَوۡمِ‌ۚ وَكُنَّا لِحُكۡمِهِمۡ شٰهِدِيۡنَ ۙ‏ ﴿۷۸﴾

आणि दाऊद आणि सुलेमानाची पण आठवण करा, जेव्हा की ते एका शेताच्या प्रकरणांत निर्णय घेत होते की, काही लोकांच्या बकऱ्या, त्यांच्यात चरून गेल्या होत्या, आणि त्यांच्या निर्णयांच्या वेळी आम्ही हजर होतो. ७८

فَفَهَّمۡنٰهَا سُلَيۡمٰنَ‌‌ ۚ وَكُلًّا اٰتَيۡنَا حُكۡمًا وَّعِلۡمًا‌ ۖ وَّسَخَّرۡنَا مَعَ دَاوٗدَ الۡجِبَالَ يُسَبِّحۡنَ وَالطَّيۡرَ‌ ؕ وَكُنَّا فٰعِلِيۡنَ‏ ﴿۷۹﴾

आम्ही त्याचा योग्य निर्णय सुलैमानला समजावून दिला.[२] होय! आम्ही (दोघातून) प्रत्येकाला निर्णय शक्ती आणि ज्ञान देऊन ठेविले होते. आणि पर्वतांना आम्ही दाऊदच्या अधिन करून ठेवले होते, जे (अल्लाह्चे)पावित्र्य वर्णन करीत असत[३] आणि पक्षी सुद्धा; आणि[४] आम्ही (असले पराकम्र) करीतच होतो.[५] ७९

وَعَلَّمۡنٰهُ صَنۡعَةَ لَبُوۡسٍ لَّـكُمۡ لِتُحۡصِنَكُمۡ مِّنۡۢ بَاۡسِكُمۡ‌ۚ فَهَلۡ اَنۡتُمۡ شٰكِرُوۡنَ‏ ﴿۸۰﴾

आणि आम्ही त्याला तुमच्यासाठी, पोशाख (चिलखत) बनविण्याची कारागिरी शिकवली, की युध्दात, (एकमेकांच्या) प्रहारांपासून तुमचा बचाव व्हावा.[६] काय तुम्ही आभार मानणारे होणार ? ८०

وَلِسُلَيۡمٰنَ الرِّيۡحَ عَاصِفَةً تَجۡرِىۡ بِاَمۡرِهٖۤ اِلَى الۡاَرۡضِ الَّتِىۡ بٰرَكۡنَا فِيۡهَا‌ ؕ وَكُنَّا بِكُلِّ شَىۡءٍ عٰلِمِيۡنَ‏ ﴿۸۱﴾

आणि आम्ही जोराने वाहणाऱ्या वाऱ्याला, सुलैमानच्या अधिन करून दिले होते,[७] जो त्याच्या हुकूमाप्रमाणे, त्या भूमीकडे वाहत असे जिला आम्ही आशीर्वादित करून ठेवले होते. आणि आम्ही सर्व वस्तुंचे जाणणारे आहोत. ८१

وَمِنَ الشَّيٰطِيۡنِ مَنۡ يَّغُوۡصُوۡنَ لَهٗ وَيَعۡمَلُوۡنَ عَمَلًا دُوۡنَ ذٰلِكَ‌ۚ وَكُنَّا لَهُمۡ حٰفِظِيۡنَ ۙ‏ ﴿۸۲﴾

आणि अशाप्रकारे पुष्कळसे शैतान सुध्दांआम्ही त्याच्या अधिन करून दिले होते; जे त्याच्या हुकूमाने सूर मारित, आणि याच्या शिवाय पण अनेक कामें करीत असतं.[८] आणि आम्हीच त्यांना सावरून होतो.[९] ८२

وَاَيُّوۡبَ اِذۡ نَادٰى رَبَّهٗۤ اَنِّىۡ مَسَّنِىَ الضُّرُّ وَاَنۡتَ اَرۡحَمُ الرّٰحِمِيۡنَ ۖۚ‏ ﴿۸۳﴾

आणि अय्यूबच्या त्या स्थितीची आठवण करा, जेव्हा की, त्याने आपल्या पालकर्त्याचा धावा केला की, मला या रोगाने ग्रासले आहे; आणि तू सर्व दयाकर्त्यांत सर्वांत जास्त दया करणारा आहेस. ८३

१) ह. लूत عليه السلام ह. इब्राहीम عليه السلام चे पुतणे, आणि ह. इब्राहिम عليه السلام वर ईमान आणणारे, आणि त्यांच्या बरोबर इराकहून स्वदेश त्याग करून, सीरियाला जाणाऱ्यांमधून होते. अल्लाहने त्यांना पण ज्ञान आणि निर्णयशक्ती म्हणजे पैगंबरी दिली. हे ज्या इलाख्या त पैगंबर बनवून पाठविले गेले, त्याला अमूरा आणि सद्दूम म्हटले जाते. हा, पॅलेस्टाईनच्या मृत समुद्राला लागून, ओमानच्या बाजुला एक सुपीक प्रदेश होता. ज्याचा एक मोठा भाग आतां, मृत समुद्राचे अंग बनून आहे. त्यांचे लोक, समलिंगी संभोगासारख्या निर्लज्ज कामांत, आणि येणाऱ्या जाणाऱ्यांवर रस्त्यांत बसून, येण्याजाणाऱ्यांवर तोंडसुख घेणे, आणि त्यांना त्रास देणे, दगडी मारणे वगैरेसाठी प्रसिध्द होते. ज्याला अल्लाहतआलाने येथे घाणेरड्या कामांनी संबोधित केले आहे. सरशेवटी लूत عليه السلام ला. आपल्या दयाछत्राखाली घेऊन, त्यांना वाचवून, त्या समाजाला नष्ट करून टाकण्यात आले.

२) भाष्यकरांनी ही गोष्ट अशाप्रकारे वर्णने केली आहे कीं, एका माणसाच्या बकऱ्या, दुसऱ्या माणसांच्या शेतात रात्री घुसून गेल्या; आणि त्याचे पीक चरून टाकले. ह. दाऊद عليه السلام जे पैगंबरी बरोबर, सत्ताधीश पण होते, निर्णय दिला कीं, बकऱ्या शेतवाल्याने घेऊन टाकाव्यात कीं, त्याच्या नुकसानाची भरपाई होऊन जावी. ह. सुलैमान عليه السلام ने या निर्णयाशी मतभेद केला; आणि हा निर्णय दिला कीं, काही काळासाठी बकऱ्या शेतमालकाला दिल्या जाव्यांत, त्याने त्यांच्यापासून फायदा उचलावा; आणि शेती, बकऱ्यावाल्याच्या हवाली करण्यांत यावी कारण की त्याने शेतीला पाणी देऊन, आणि देखरेख करून, तिला बरोबर(म्हणजे पूर्वीसारखे) करावे; जेव्हा ती त्या स्थितीवर येऊन जाईल, जी बकऱ्या चरण्यापूर्वी होती, तर शेती शेतीवाल्याला, आणि बकऱ्या, बकऱ्या वाल्याला परत दिल्या जाव्यांत. पहिल्या निर्णयाच्या तुलनेत, या अनुषंगाने जास्त उत्तम होते कीं, यांच्यात कोणालाही आपल्या वस्तुंपासून वंचित व्हावे लागले नाहीं. जेव्हा पहिल्या निर्णयांत, बकरीवाले आपल्या बकऱ्यांपासून वंचित होऊन गेले होते. तथापि अल्लाहने ह. दाऊद عليه السلام ची प्रशंसा केली; आणि सांगितले कींआम्ही प्रत्येकाला (म्हणजे ह. दाऊद عليه السلام आणि ह. सलैमान عليه السلام दोघांना) ज्ञान आणि निर्णयशक्ती दिली होती. काही लोक याच्याने आधार घेत म्हणतात की,

✪ मुजतहीद प्रत्येक सर्व गोष्टीच्या मुळापर्यंत पोहचतो. इमाम शौकानी म्हणतात हा दावा बरोबर नाहीं, कोण्या एका प्रकरणांत, दोन वेगवेगळे निर्णय करणारे, दोन मुजतहीद, दोन्ही एकाच वेळी, कोण्या गोष्टीच्या मुळापर्यंत पोहचू शकत नाहीं. याच्यांत एक अवश्य, योग्य निर्णय करणारा म्हणजे मुळापर्यंत पोहचणारा असेल आणि दुसरा, चुकीचा निर्णय देणारा. तथापि ही वेगळी गोष्ट आहे कीं, मुजतहीद, चुकीचा निर्णय देणारा, अल्लाह्जवळ गुन्हेगार होणार नाही, किंबहुना त्याला एक पुण्य मिळेल. कमाफिल हदीस (फत्हुल कदीर)

३) याच्याने अभिप्रेत हे नाही कीं, पर्वत त्यांच्या पावित्र्य वर्णनाच्या आवाजाने दणाणून निघत. (कारण यांच्यात तर काही विशेष असे नाहीच) प्रत्येकाच्या मोठ्या आवाजाने पर्वतात प्रतिध्वनी निर्माण होऊं शकतो, किंबहुना याचा अर्थ असा आहे की, ह. दाऊद عليه السلام च्या पावित्र्य वर्णना बरोबर, पर्वताचे पण पावित्र्य वर्णन करणे आहे. हे काल्पनिक नाही, वास्तविक होते.

४) म्हणजे पक्षी सुध्दा ह. दाऊद عليه السلام चा आर्त आवाज ऐकून अल्लाह्चे पावित्र्य वर्णन करू लागत. अर्थ हे आहे कीं, पक्षी सुध्दा, ह. दाऊद عليه السلام करीता त्यांच्या अधिन करून दिले गेले होते(फत्हुल कदीर)

५) म्हणजे हे समजाविणे, हुकुमाचे अधिन करणे आणि आज्ञांकित करणे, या सर्वांचे करणारे आम्हीच होतो. म्हणून यांच्यात कोणालाही आश्चर्य करण्याची किंवा नाकारण्याची आवश्यकता नाहीं, या करितांकीं, आम्ही जे इच्छितो, ते करू शकतो.

६) म्हणजे लोखंडाला आम्ही दाऊद عليه السلام साठी मऊ करून दिले होते. ते त्याच्यापासून चिलखत आणि शिरस्त्राण तयार करीत असत. जी युध्दांत तुमच्या संरक्षणाची साधने आहेत. ह. कतादा رضي الله عنه म्हणतात, कीं ह. दाऊद عليه السلام च्यापूर्वी सुध्दा चिलखत बनत असत. परंतु ती साधी, कड्या कोंड्या शिवाय असावयाची. ह. दाऊद عليه السلام हे पहिले माणूस आहेत, ज्यांनी कोंडेदार आणि कड्यांवाली चिलखते बनविली.

७) म्हणजे ज्याप्रमाणे पर्वत आणि पक्षी, ह. दाऊद عليه السلام करिता अधिन करूंदिले गेले होते, त्याचप्रमाणे हवा, हे सुलैमान अ.च्या अंकीत् करून दिली होती. ते आपल्या राज्याच्या अधिनस्थ लोकांसह सिंहासनावर बसून जात असत, आणि जेथे इच्छित, महिन्यांचा प्रवास, क्षणांत व घटकांत पार करून तेथे पोहचून जात असत. वारा (हवा) आपल्या सिंहासनाला उडवून तेथे घेऊन जात असे. बरकतवाल्या भूप्रदेशाने अभिप्रेत सीरियाचा इलाखा आहे.

८) जिन्नात पण ह. सुलैमान عليه السلام च्या ताब्यांत होते; जे त्यांच्या हुकुमाने समुद्रांत सूर मारीत आणि मोती आणि रत्ने काढून आणित. अशाच प्रकारे दुसरे इमारती बांधण्याचे काम, जे आपण इच्छित, ते करीत असत.

९) म्हणजे जिन्नांतांमध्ये जी शिरजोरी आणि खोडसाळपणाची वृत्ती आहे, यापासून आम्ही सुलैमान عليه السلام चे संरक्षण केले; आणि ते त्यांच्या समोर डोके वर काढण्याची हिंमत करीत नसत.

فَاسْتَجَبْنَا لَهُ فَكَشَفْنَا مَا بِهِ مِن ضُرٍّ وَآتَيْنَاهُ أَهْلَهُ وَمِثْلَهُم مَّعَهُمْ رَحْمَةً مِّنْ عِندِنَا وَذِكْرَىٰ لِلْعَابِدِينَ ﴿٨٤﴾

**तर आम्ही त्याचे ऐकून घेतले, आणि जे दु:ख त्यांना होते, त्याला दूर करून टाकले. आणि आम्ही त्याला कुटूंब प्रदान केले. किंबहुना त्यांच्या बरोबर, आणखी तसेच आपल्या कृपेने;[१] कारण खऱ्या सेवकांना बोध घेण्याला कारणीभूत व्हावे. ८४**

وَإِسْمَاعِيلَ وَإِدْرِيسَ وَذَا الْكِفْلِ ۖ كُلٌّ مِّنَ الصَّابِرِينَ ﴿٨٥﴾

**आणि इस्माईल व इद्रीस, व जुल् किफ्ल, हे[२] सर्व सहनशील लोक होते. ८५**

وَأَدْخَلْنَاهُمْ فِي رَحْمَتِنَا ۖ إِنَّهُم مِّنَ الصَّالِحِينَ ﴿٨٦﴾

**आणि आम्ही त्यांना आपल्या (खास) दयेत दाखल करून घेतले. हे सर्व लोक सदाचरणी होते. ८६**

وَذَا النُّونِ إِذ ذَّهَبَ مُغَاضِبًا فَظَنَّ أَن لَّن نَّقْدِرَ عَلَيْهِ فَنَادَىٰ فِي الظُّلُمَاتِ أَن لَّا إِلَٰهَ إِلَّا أَنتَ سُبْحَانَكَ إِنِّي كُنتُ مِنَ الظَّالِمِينَ ﴿٨٧﴾

**आणि माशावाल्या[३] (ह.यूनुस) ला, आठवण करा! जेव्हा कीं तो रागाने निघून गेला, आणि असा विचार केला की, आम्ही त्याला पकडूंशकणार नाहीं. सरशेवटी तो अंध:कारातून[४] बोलून उठला की, अल्लाह्! तुझ्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही; तू पवित्र आहेस, नि:संशय मी जालिमांमधून होऊन गेलो. ८७**

فَاسْتَجَبْنَا لَهُ وَنَجَّيْنَاهُ مِنَ الْغَمِّ ۚ وَكَذَٰلِكَ نُنجِي الْمُؤْمِنِينَ ﴿٨٨﴾

**तर आम्ही त्याचे पुकारणे ऐकले, आणि दु:खापासून त्याची सुटका केली. आणि आम्ही ईमानवाल्यांना अशाच प्रकारे वाचवून घेत असतो.[५] ८८**

१) कुरआन मजीद मध्ये ह. अय्यूब عليه السلام ला. सहनशील म्हणण्यांत आले आहे. (सू- सॉद-४४) याचा अर्थ हा आहे की, त्यांना कडक परीक्षेत टाकण्यात आले. जिच्यांत त्यांनी सहनशिलता आणि आभार प्रदर्शन सोडले नाही. या परीक्षा आणि संकटे काय होती? याचा सनदशीर खुलासा तर मिळत नाहीं. तथापि कुरआनाच्या वर्णन करण्याच्या अंदाजाने, माहित पडते कीं, अल्लाह्तआलाने त्यांना धन आणि दुनियेची दौलत, आणि संतती वगैरे, खूप दिली होती. एक आजमाईश म्हणून अल्लाह्तआलाने हे सर्व हिसकाऊन घेतले; येथ पावेतो कीं शारीरिक तंदुरूस्तीने वंचित्, आणि नाना प्रकारच्या आजारात घेरुन राहिले. सरतेशेवटी असे म्हणतात कीं, १८ वर्षांच्या परीक्षेनंतर, अल्लाह्च्या दरबारांत प्रार्थना केली; अल्लाह्ने त्यांची प्रार्थना मान्य केली; आणि आरोग्यसह संपत्ती आणि संतती, पूर्वीपेक्षा दुप्पट करून दिली. (याचा काही तपशील, सहीह इब्ने हिब्बानच्या एका रिवायतीत मिळतो. आवृत्ती - ४ पृ- २४४ व मजमुअल जवाइद, २०८/८) तक्रार करणे, आणि हाय हाय करणे, सहनशिलतेच्या विरूध्द आहे. असे ह. अय्यूब عليه السلام नी कधी केले नाही. तथापि दुआ करणे सहनशिलतेच्या विरूध्द नाहीं. याचसाठी अल्लाह्तआलाने या करिता ''आम्ही मान्य केली'' चे शब्द वापरले आहेत.

२) जुलकिफ्लच्या बाबतीत मतभेद आहेत कीं, ते पैगंबर होते कीं नाही? काही यांच्या पैगंबरीला, आणि काही यांच्या वली होण्याला मान्यता देणारे आहेत. इमाम इब्ने जरीरने यांच्या बाबतीत, खामोशी अंगीकारली आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात, कुरआनांत यांचा उल्लेख, पैगंबरांबरोबर आल्याने, ते पैगंबर होते, असे जाहीर होते. वल्लाह्अअ्लम!

३) 'माशावालेने अभिप्रेत, ह. यूनुस عليه السلام आहेत. जे आपल्या लोकांशी नाराज होऊन, आणि त्यांना अल्लाह्च्या शिक्षेची धमकी देऊन, अल्लाह्च्या हुकुमाशिवायच तेथून निघून गेले होते. ज्यावर अल्लाह्ने त्यांची पकड केली. आणि माशाचा एक घास बनवून टाकले. याचा काही तपशील सू. यूनुस मध्ये येऊन चुकला आहे; आणि काही सू. साफ्फात मध्ये येईल.

४) जुलूमात अंध:कार या अर्थात आहे. ह. यूनुस عليه السلام निरनिराळ्या अंध:कारात घेरले गेले. एक तर रात्रीचा अंध:कार, समुद्राचा अंध:कार, आणि माशाच्या पोटांतील अंध:कार.

५) आम्ही यूनुस عليه السلام ची दुआ मान्य केली. आणि त्याला अंध:कारांतून आणि मासळीच्या पोटांतून बाहेर काढले, आणि जो पण ईमानवाला आम्हांस, अशा प्रकारे कठीण परिस्थिती आणि संकटात, बोलावील, आम्ही त्याला सुटका देऊ, हदीस मध्ये सुध्दा येते, नबी ﷺ नी फर्माविले, ''ज्या मुसलमानाने पण या दुआ बरोबर, कोण्या प्रकरणांत दुआ मागीतली, तर अल्लाह्ने तिला कबुल केले आहे. (जामे तिर्मिझी क्र. ३५०५ व सदहुल अल्बानी)

وَ زَكَرِيَّآ إِذۡ نَادَىٰ رَبَّهُۥ رَبِّ لَا تَذَرۡنِي فَرۡدٗا وَّ أَنتَ خَيۡرُ ٱلۡوَٰرِثِينَ ٨٩

**आणि जकरियाची आठवण करा. की जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना केली की हे माझ्या पालनकर्त्या! मला एकटा सोडू नकोस. तू सर्वांत उत्तम वारस आहेस. ८९**

فَٱسۡتَجَبۡنَا لَهُۥ وَوَهَبۡنَا لَهُۥ يَحۡيَىٰ وَأَصۡلَحۡنَا لَهُۥ زَوۡجَهُۥٓۚ إِنَّهُمۡ كَانُواْ يُسَٰرِعُونَ فِي ٱلۡخَيۡرَٰتِ وَيَدۡعُونَنَا رَغَبٗا وَرَهَبٗاۖ وَكَانُواْ لَنَا خَٰشِعِينَ ٩٠

**तर आम्ही त्याची प्रार्थना मान्य करून, त्याला 'यह्या' प्रदान केला.[१] आणि त्यांच्या पत्नीला त्यांच्यासाठी दुरूस्त करून टाकले.[२] हे लोक सुकृत्यांत त्वरीत धाव घेत असत. आणि आम्हास अभिलाषेने, व भीतीने बोलावित असत. आणि आमच्या समोर विनयशिलता धारण करणारे होते.[३] ९०**

وَٱلَّتِيٓ أَحۡصَنَتۡ فَرۡجَهَا فَنَفَخۡنَا فِيهَا مِن رُّوحِنَا وَجَعَلۡنَٰهَا وَٱبۡنَهَآ ءَايَةٗ لِّلۡعَٰلَمِينَ ٩١

**आणि ती सदाचरणी स्त्री जिने आपली लाज सांभाळली, आम्ही तिच्यांत आपल्या आत्म्यांतून फुंकिले; आणि स्वत:तिला आणि तिच्या मुलाला, सकल जगासाठी एक निशाणी बनविले.[४] ९१**

إِنَّ هَٰذِهِۦٓ أُمَّتُكُمۡ أُمَّةٗ وَٰحِدَةٗ وَأَنَا۠ رَبُّكُمۡ فَٱعۡبُدُونِ ٩٢

**नि:संशय ही तुमची उम्मत आहे, जी वास्तविक एकच उम्मत आहे. आणि[५] मी तुम्हासर्वांचा पालनकर्ता आहे. तर तुम्ही फक्त माझीच उपासना करा. ९२**

ع ६ ४८

وَتَقَطَّعُوٓاْ أَمۡرَهُم بَيۡنَهُمۡۖ كُلٌّ إِلَيۡنَا رَٰجِعُونَ ٩٣

**आणि परंतु लोकांनी आपसात आपल्या धर्मात पंथ पंथ करून टाकले. सर्वच्या सर्व आमच्याच कडे परतून येणार आहेत.[६] ९३**

فَمَن يَعۡمَلۡ مِنَ ٱلصَّٰلِحَٰتِ وَهُوَ مُؤۡمِنٞ فَلَا كُفۡرَانَ لِسَعۡيِهِۦ وَإِنَّا لَهُۥ كَٰتِبُونَ ٩٤

**मग जो कोणी चांगली कामे करीन, आणि तो ईमानवाला (पण) असेल, तर त्याच्या प्रयत्नांची नाकारणी केली जाणार नाहीं. आम्ही तर त्याचे नोंदविणारे आहोत. ९४**

وَحَرَٰمٌ عَلَىٰ قَرۡيَةٍ أَهۡلَكۡنَٰهَآ أَنَّهُمۡ لَا يَرۡجِعُونَ ٩٥

**आणि ज्या वस्तीला आम्ही नष्ट करून टाकले, तिच्यावर आवश्यक आहे कीं तेथील लोक, पालटून येणार नाहीत;[७] ९५**

१) ह. जकरिया عليه السلام चे म्हातारपणांत, संततीसाठी ढुआ करणे, आणि अल्लाहकडून ती दिली जाणे, याचा जरूरी तफसील, सू.आले इमरान आणि सू. ताहामध्ये येऊन चुकला आहे. येथे पण याच्याकरीता इशारा, या शब्दात केला आहे.

२) म्हणजे ती वांझ, आणि संतती देण्यासाठी असमर्थ होती. आम्ही तिच्या या रोगाचे निर्सन करून, तिला एक सदाचरणी मूल दिले.

३) जणू ढुआच्या मान्यतेसाठी आवश्यक आहे कीं, या गोष्टींची काळजी घेतली जावी. ज्यांचा खास म्हणून, येथे उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, रडून भेकून, अल्लाहच्या दरबारांत ढुआ आणि गाऱ्हाणे, पुण्याच्या कामांत पुढे सरसावणे, भीती आणि आशेच्या संमिश्र भावनेसह, पालनकर्त्याला पुकारणे, आणि त्याच्या समोर विनयशिलता व व्याकुळता जाहीर करणे.

४) ही, हजरत मर्यम आणि ह. ईसा عليه السلام ची चर्चा आहे; जी पहले येऊन चुकली आहे.

५) 'उम्मत' ने अभिप्रेत येथे धर्म किंवा समूह आहे. म्हणजे तुमचा धर्म किंवा समूह एकच आहे. आणि तो धर्म आहे, एकेश्वरवादाचा धर्म, ज्याचे आमंत्रण प्रत्येक पैगंबराने दिले. आणि मिल्लत (समूह) इस्लामची मिल्लत आहे. जी प्रत्येक पैगंबराची मिल्लत राहीली आहे. ज्याप्रमाणे नबी ﷺ नी फर्माविले, ''आम्हा पैगंबरांच्या समूह, अल्लाती संतती आहेत. (ज्यांचा बाप एक, आणि आया वेगवेगळ्या असाव्यांत) आमचा धर्म एकच आहे.'' (इब्ने कसीर)

६) म्हणजे तौहीद चा धर्म आणि पालनकर्त्याची उपासना सोडून, वेगवेगळ्या पंथांत आणि गटात विभागून गेलेत, एक गट तर मुशरिक आणि काफिरांचा होऊन गेला आणि पैगंबरांचे मानणारे सुध्दां, समूह समूह बनून गेले. कोणी यहूदी होऊन गेले. कोणी खिस्ती, कोणी आणखी काहीं दुर्दैवाने हे पंथ खुद्द मुसलमानांमध्ये सुध्दा निर्माण होऊन गेले; आणि हे ही अनेक पंथात विभागले गेले. या सर्वांचा निर्णय जेव्हा हे अल्लाहच्या दरबारांतून परतून जातील, तेव्हा तेथेच होईल.

७) 'हरामून' वाजिबच्या अर्थात आहे. जसे की भाषांतराने जाहीर आहे. किंवा मग 'ला यरजेऊन' मध्ये 'ला' जास्तीचा आहे. म्हणजे ज्या वस्तीला आम्ही नष्ट करून टाकले, त्यांचे जगांत पलटून येणे हराम आहे.

حَتّٰىٓ اِذَا فُتِحَتْ يَاْجُوْجُ وَ مَاْجُوْجُ وَهُمْ مِّنْ كُلِّ حَدَبٍ يَّنْسِلُوْنَ ﴿٩٦﴾

येथ पावेतो की, याजूज आणि माजूज मोकळे सोडून दिले जातील; आणि हरेक उंची वरून घसरत चालले येतील[१] ﴿९६﴾

وَ اقْتَرَبَ الْوَعْدُ الْحَقُّ فَاِذَا هِيَ شَاخِصَةٌ اَبْصَارُ الَّذِيْنَ كَفَرُوْا ؕ يٰوَيْلَنَا قَدْ كُنَّا فِيْ غَفْلَةٍ مِّنْ هٰذَا بَلْ كُنَّا ظٰلِمِيْنَ ﴿٩٧﴾

आणि सत्य वचन जवळ येऊन ठेपेल. त्यावेळी काफिरांचे डोळे उघडेचे उघडे राहून जातील;[२] की हाय अफसोस! आम्ही तर या अवस्थेकडून फसगतीतच राहिलो. किंबहुना खरे पाहता आम्हीच कसुरवार होतो. ﴿९७﴾

اِنَّكُمْ وَمَا تَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ حَصَبُ جَهَنَّمَ ؕ اَنْتُمْ لَهَا وٰرِدُوْنَ ﴿٩٨﴾

नि:संशय तुम्ही, आणि अल्लाहच्या शिवाय, ज्यांची ज्यांची तुम्ही भक्ती करीत होता, सर्व नरकाग्नीचे इंधन होतील. तुम्ही सर्व नरकाग्नीत जाणार आहात.[३] ﴿९८﴾

لَوْ كَانَ هٰٓؤُلَآءِ اٰلِهَةً مَّا وَرَدُوْهَا ؕ وَكُلٌّ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿٩٩﴾

जर हे (खरे) उपास्य असते तर नरकाग्नीत गेले नसते; आणि सर्वच्या सर्व त्याच्यात नित्य नेहमी राहणार आहेत.[४] ﴿९९﴾

لَهُمْ فِيْهَا زَفِيْرٌ وَّهُمْ فِيْهَا لَا يَسْمَعُوْنَ ﴿١٠٠﴾

ते तेथे आक्रोश करीत असतील, आणि तेथे काहीपण ऐकू शकणार नाहीत.[५] ﴿१००﴾

اِنَّ الَّذِيْنَ سَبَقَتْ لَهُمْ مِّنَّا الْحُسْنٰٓى ۙ اُولٰٓئِكَ عَنْهَا مُبْعَدُوْنَ ﴿١٠١﴾

तथापि ज्यांच्याकरिता आमच्याकडून भलाई पूर्वीच ठरुन चुकली आहे, ते सर्व नरकाग्नीपासून दुरच दुर ठेवले जातील.[६] ﴿१०१﴾

لَا يَسْمَعُوْنَ حَسِيْسَهَا ۚ وَهُمْ فِيْ مَا اشْتَهَتْ اَنْفُسُهُمْ خٰلِدُوْنَ ﴿١٠٢﴾

ते तर नरकाग्नीचा आवाज पण ऐकणार नाहीत; आणि आपल्या मनपसंत वस्तुत सर्वकाळ राहतील. ﴿१०२﴾

لَا يَحْزُنُهُمُ الْفَزَعُ الْاَكْبَرُ وَ تَتَلَقّٰىهُمُ الْمَلٰٓئِكَةُ ؕ هٰذَا يَوْمُكُمُ الَّذِيْ كُنْتُمْ تُوْعَدُوْنَ ﴿١٠٣﴾

ती (कयामतची) मोठी धास्तीपण[७] त्यांना क्लेशयुक्त करु शकणार नाही; आणि देवदूत त्यांना सामोरे येतील; (आणि म्हणतील) की हाच तुमचा तो दिवस आहे, ज्याचे तुम्हास वचन दिले जात होते. ﴿१०३﴾

يَوْمَ نَطْوِي السَّمَآءَ كَطَيِّ السِّجِلِّ لِلْكُتُبِ ؕ كَمَا بَدَاْنَآ اَوَّلَ خَلْقٍ نُّعِيْدُهٗ ؕ وَعْدًا عَلَيْنَا ؕ اِنَّا كُنَّا فٰعِلِيْنَ ﴿١٠٤﴾

त्या दिवशी आम्ही आकाशाला असे गुंढाळून घेऊ, जसे पत्रांची पाने गुंडाळून दिली जातात;[८] जसे की आम्ही पहिल्या वेळेस निर्माण केले होते, अशाच प्रकारे दुसऱ्यांदा करु; हे आमच्या ठाई एक वचन आहे, आणि आम्ही त्याला अवश्य पाळूच पाळू. ﴿१०४﴾

وَلَقَدْ كَتَبْنَا فِي الزَّبُوْرِ مِنْۢ بَعْدِ الذِّكْرِ اَنَّ الْاَرْضَ يَرِثُهَا عِبَادِيَ الصّٰلِحُوْنَ ﴿١٠٥﴾

आणि आम्ही जबूर मध्ये, उपदेश– बोध केल्यानंतर, हे लिहून चुकलो आहोत की, पृथ्वीचे वारस माझे सदाचरणी सेवकच[९] होतील. ﴿१०५﴾

اِنَّ فِيْ هٰذَا لَبَلٰغًا لِّقَوْمٍ عٰبِدِيْنَ ﴿١٠٦﴾

स्वचितच उपासनेत व्यस्त होणाऱ्या सेवकांसाठी तर यामध्यें, एक शुभवर्तमान आहे.[१०] ﴿१०६﴾

१) याजूज व माजूजचा आवश्यक तपशील सू. कहफच्या शेवटीं, येऊन चुकला आहे. ह. ईसा عليه السلام च्या उपस्थितीत, कयामतच्या जवळ, हे जाहीर होतील. आणि इतक्या जलदगतीने आणि भरपूर संख्येने हे, चोहीकडे पसरून जातील कीं, प्रत्येक उंच जागेवरुन, हे पळत पळत आहेत, असे वाटेल. त्यांच्या फिसाद आणि खोडकरपणामुळे, ईमानवाले तंग होऊन जातील. येथ पावेतो कीं ह. ईसा عليه السلام ईमानवाल्यांना, बरोबर घेऊन, तूर पर्वतावर आश्रय घेतील. मग ईसा अ. च्या शापाने, हे नष्ट होऊन जातील. त्यांच्या प्रेतांचा सडलेला दुर्गंध, सर्व दूर पसरलेला असेल. येथपावेतो, की अल्लाहतआला काही पक्षी पाठवेन, जे यांच्या प्रेतांना उचलून, समुद्रांत फेकून देतील. मग एक खूप मोठा पाऊस, अल्लाहतआला पाडेन. ज्याच्याने सर्व जमीन स्वच्छ होऊन जाईल. (हा सारा तपशील स. हदीशींमध्ये सांगण्यात आलेला आहे. तपशीलासाठी कृपया तफसीर इब्ने कसीर पहावे.)

२) म्हणजे याजूज आणि माजूजच्या निघाल्यानंतर, कयामतचे वचन, जे होणारच आहे, फारच जवळ येऊन लागले; आणि जेव्हा ही कयामत येऊन लागेल, तर फारच तीव्र धास्तीमुळे, काफिरांचे डोळे उघडेच्या उघडे राहून जातील.

३) हे महावाक्य मक्केच्या मुशरिकांच्या बाबतीत प्रकट झाले आहे. जे लात व मनात, आणि उज्जा व हुबलची पुजा करीत असत. या सर्व दगडांच्या मूर्त्या होत्या. ज्या जमादात म्हणजे बुध्दिहीन होत्या; याचसाठी महावाक्यांत 'मा तअबुदून' चे शब्द आहेत. आणि अरबीमध्ये 'मा' निर्जिवांसाठी येतो. म्हणजे सांगण्यात येत आहे की, तुम्ही सुध्दा आणि तुमचे हे उपास्य सुध्दा ज्यांच्या मूर्त्या बनवून तुम्ही उपासनेसाठी ठेवल्या आहेत; सर्व नरकाग्नीचे इंधन आहेत. दगडांच्या मूर्तींचा जरी काही कसूर नाही. कारण की ते बुध्दीहीन आणि समजहीन आहेत. परंतु त्यांना पुजाऱ्यांच्या बरोबर, नरकाग्नी मध्ये फक्त मुशरिकांना आणखी जास्त फटफजीत करण्यासाठी, टाकण्यात येईल, की, ज्या उपास्यांना तुम्ही आपला सहारा समजत होते, ते सुध्दा तुमच्या बरोबर नरकाग्नीचे इंधन आहेत.

४) म्हणजे जर हे खरोखर उपास्य असते, तर अधिकार संपन्न असते; आणि तुम्हास नरकाग्नीत जाण्यापासून वांचवून घेतले असते. परंतु ते स्वत:च नरकाग्नी मध्ये, धडा देण्यासाठी म्हणून जात आहेत. तुम्हास नरकाग्नीत जाण्यापासून कसे वाचवतील? परिणामी भक्त आणि उपास्य, दोन्ही नेहमी नरकाग्नीत राहतील.

५) म्हणजे सर्वच्या सर्व, तीव्र दु:खामुळे, आक्रोश करीत असतील. ज्यामुळे ते एक दुसऱ्याचा आवाज पण ऐकू शकणार नाहीत.

६) काही लोकांच्या मनात ही शंका निर्माण होऊ शकत होती, किंवा मुशरिकांकडून उपस्थित केली जाऊ शकत होती. जसे की, खरोखर केले जाते की, उपासना तर ह. ईसा عليه السلام ह. उजैर عليه السلام , देवदूत, आणि पुष्कळसे सदाचरणी लोक, यांची पण केली जाते. तर काय हे सुध्दा आपल्या भक्तांसमवेत नरकाग्नीमध्ये टाकले जातील? या महावाक्यात याचे निर्सन करुन देण्यात आले आहे की, हे लोक तर अल्लाह्चे पुण्यवान सेवक होते; ज्यांच्या पुण्यामुळे, अल्लाहकडून, त्यांच्या करिता पुण्य, म्हणजे कायमचे सुदैव, किंवा स्वर्गाची शुभ सूचना, ठरवून टाकण्यात आली आहे. हे नरकाग्नीपासून दुरच राहतील. याच शब्दांनी हा भावार्थ पण स्पष्टपणे निघतो कीं, जे लोक, या जगात ही इच्छा बाळगत असतील कीं त्यांच्या कबरीवर पण घुमटे बनावेत, आणि लोकांनी त्यांना, इच्छापूर्ती करणारे समजून त्यांच्या नावाने नवस करावेत आणि त्यांची भक्ती करावी; हे पण दगडांच्या मूर्तींप्रमाणे, नरकाग्नीचे इंधन होतील. कारण कीं, अल्लाह् शिवाय, इतरांच्या भक्तीचे आमंत्रण देणारे, ''सबकत् लहुम् मिन्नल हुस्ना'' मध्ये कधीच येत नाहीं.

७) मोठ्या धास्तीने मृत्यु, किंवा इसराफील عليه السلام चे सूर फुंकणे, अभिप्रेत आहे, किंवा तो क्षण, जेव्हा नरकाग्नी आणि स्वर्गाच्या दर्म्यान, मृत्युला जबाह करून टाकले जाईल. दुसरी गोष्ट म्हणजे इसराफील عليه السلام चे सुर फुंकणे, आणि कयामतचे कायम होणे, हे वरील चर्चित विषयाच्यादृष्टीने जास्त जवळ आहे.

८) म्हणजे ज्याप्रमाणे लेखक, लिहिल्यानंतर, पाने किंवा रजीस्टरला गुंडाळून ठेवतो. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आकाश त्याच्या उजव्या हातांत गुंडाळलेले असतील.'' (सू.जुमर-६७) 'सिजिल्ल' चा अर्थ पाने किंवा रजीस्टर आहेत. लिल्कुतुबाचा अर्थ आहे, लिहिलेल्या लेखकाकरिता, लिहिलेल्या कागदांना, गुंडाळून ठेवणे ज्याप्रमाणे सोपे आहे; अशाच प्रकारे, आकाशांच्या पापुद्रयांना हाताने गुंडाळून ठेवणे, अल्लाह्करता कठीण काम नाही.

९) जबूरने अभिप्रेत एक तर जबूरच आहे, आणि स्मरणाने अभिप्रेत, उपदेश आणि बोध आहे, जसे की, भाषांतरांत नमुद आहे. किंवा मग जबूरने अभिप्रेत, मागील आकाशी ग्रंथ आणि स्मरणाने अभिप्रेत लौहे महफूज आहे. म्हणजे पहिल्या प्रथम तर लौहेमहफुजमध्ये ही गोष्ट नमुद आहे आणि याच्यानंतर सुध्दा, आकाशी ग्रंथात सुध्दा ही गोष्ट लिहिली जात राहिली आहे की, पृथ्वीचे वारस, पुण्यवान सेवक होतील. जमिनीने अभिप्रेत, काही भाष्यकारांजवळ, स्वर्ग आहे; आणि काहीजवळ, काफिरांची जमीन, म्हणजे अल्लाहचे निस्सीम सेवक, पृथ्वीत अधिकाराचे मालक होतील आणि याच्यात काही शंका नाही की, मुसलमान जोपर्यंत अल्लाहचे पुण्यवान सेवक राहिले, ते जगात अधिकार संपन्न आणि यशस्वी राहिले आणि पुढे सुध्दा जेव्हा कधी, या वैशिष्टयांनी ते संपन्न असतील, अल्लाहच्या या वचनाप्रमाणे, भूमीची सत्ता, त्यांच्याचकडे असेल. म्हणून मुसलमानांची, सत्तेपासून वंचित राहण्याची सद्यस्थिती, कोण्या शंकेला कारणीभूत न व्हावयास पाहिजे. यांच्यात जणू सत्ता मिळविण्याची पध्दत सांगितली गेली आहे. आणि ती आहे पुण्यवान होणे. म्हणजे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या हुकूमाप्रमाणे जीवन जगणे. आणि त्याच्या मर्यादा आणि कायद्यांवर कार्यरत रहाणे.

१०) 'फी हाजा' ने अभिप्रेत तो उपदेश आणि तंबी आहे; जी या अध्यायांत वेगवेगळ्या प्रकारे सांगण्यात आली आहे. 'बलाग' ने अभिप्रेत पुरेसा आणि फायदेकारक. म्हणजे तो पुरेसा आणि फायदेकारक आहे किंवा याच्याने अभिप्रेत कुरआन मजीद आहे. ज्यांत मुसलमानांसाठी नफा आणि पुरेसे होणे आहे. 'आबेदीन' ने अभिप्रेत नम्रतेने आणि व्याकुळतेने अल्लाह्ची भक्ती करणारे आहेत. आणि शैतान आणि मनेच्छेवर, अल्लाह्च्या आज्ञापालनाला प्राधान्य देणारे आहेत.

وَمَآ اَرۡسَلۡنٰكَ اِلَّا رَحۡمَةً لِّلۡعٰلَمِيۡنَ ١٠٧

**आणि आम्ही आपणास, सकल जगांच्या (लोकां) करीता रहमत बनवूनच पाठविले आहे.[१] १०७**

قُلۡ اِنَّمَا يُوۡحٰٓى اِلَىَّ اَنَّمَآ اِلٰهُكُمۡ اِلٰهٌ وَّاحِدٌ ۚ فَهَلۡ اَنۡتُمۡ مُّسۡلِمُوۡنَ ١٠٨

**आपण सांगून टाका कीं, माझ्या कडे तर 'वह्या' केली जाते कि तुम्हा सर्वांचा उपास्य तर एकच आहे. तर काय तुम्ही सुध्दा याला मान्य करणारे आहात?[२] १०८**

فَاِنۡ تَوَلَّوۡا فَقُلۡ اٰذَنۡتُكُمۡ عَلٰى سَوَآءٍ ؕ وَاِنۡ اَدۡرِىۡۤ اَقَرِيۡبٌ اَمۡ بَعِيۡدٌ مَّا تُوۡعَدُوۡنَ ١٠٩

**मग जर यांनी तोंड फिरविले, तर सांगून टाका कीं मी तुम्हास, एकसारखी सूचना दिली आहे.[३] मला खरोखरीच याचे ज्ञान नाहीं कीं, ज्याचे वचन तुम्हांस दिले जात आहे ते जवळ आहे की दूर आहे.[४] १०९**

اِنَّهٗ يَعۡلَمُ الۡجَهۡرَ مِنَ الۡقَوۡلِ وَيَعۡلَمُ مَا تَكۡتُمُوۡنَ ١١٠

**तथापि अल्लाहतआला उघड आणि जाहीर (गोष्टींनापण) जाणतो; आणि जे तुम्ही लपवितात, त्याला पण जाणतो, ११०**

وَاِنۡ اَدۡرِىۡ لَعَلَّهٗ فِتۡنَةٌ لَّكُمۡ وَمَتَاعٌ اِلٰى حِيۡنٍ ١١١

**मला याचेही ज्ञान नाही, शक्य आहे की, ही तुमची परीक्षांअसेल, आणि एका ठरावीक वेळे पुरता फायदा असावा. १११**

قٰلَ رَبِّ احۡكُمۡ بِالۡحَقِّ ؕ وَرَبُّنَا الرَّحۡمٰنُ الۡمُسۡتَعَانُ عَلٰى مَا تَصِفُوۡنَ ١١٢

**पैगंबराने[५] म्हटले की हे माझ्या पालनकर्त्या! न्यायपूर्ण निवाडा करून दे! आणि आमचा पालनकर्ता मोठा दयाळू आहे; ज्याच्या जवळ मदत मागितली जाते; त्या गोष्टींवर, ज्या तुम्ही सांगतात.[६] ११२**

१) याचा अर्थ हा आहे की, जो आपल्या ﷺ पैगंबरीवर ईमान आणेल, त्याने जणू त्याच्या दयेला मान्य करून घेतले; आणि अल्लाहच्या त्या देणगीचे आभार मानले; परिणामी त्याला इहलोक आणि परलोकाचे सद्भाग्य लाभेल. कारण कीं, आपली ﷺ पैगंबरी साऱ्या जगासाठी आहे. म्हणून आपण ﷺ साऱ्या विश्वासाठी रहमत बनून, म्हणजे आपल्या शिकवणीं व्दारे, धार्मिक व ऐहिक सद्भाग्य प्राप्त करून देण्यासाठी आले आहेत. काही लोकांनी या अनुषंगाने सुध्दा नबी ﷺ ला सकल जगातील लोकांसाठी रहमत ठरविले आहे. कीं, आपल्या मुळेही उम्मत संपूर्ण तबाह आणि बर्बाद होण्यापासून सुरक्षित करून दिली गेली. जसे मागील समाज आणि उम्मती चुकीच्या अक्षरांसारखे पुसून टाकण्यांत आल्यात. उम्मते मुहम्मदियावर अशा प्रकारची संपूर्ण शिक्षांयेणार नाही आणि हदीशींनी ठाऊक होते कीं, मुशरिक लोकांसाठी कधी बद्दुआ न करणे, हा पण आपल्या दयेचा एक भाग होता. याच साठी एका हदीस मध्यें आपण (ﷺ नी) फर्माविले, ''मी (साक्षात) रहमत बनून आलो आहे, जो अल्लाह्कडून, साऱ्या जगासाठी एक भेट आहे.'' (सहीहुल जामीऊल सगीर क्र २३४५)

२) यात हे स्पष्ट करण्यात आले आहे की, खरी रहमत, एकेश्वरवादाचा अंगीकार आणि शिर्कपासून वाचून जाणे आहे.

३) म्हणजे ज्याप्रमाणे मी जाणतो की, तुम्ही माझ्या एकेश्वरवादाच्या आमंत्रणाकडून तोंड फिरवून, माझे शत्रु आहांत, अशाच प्रकारे, तुम्हास पण ठाऊक व्हावयास पाहिजे की, मी पण तुमचा शत्रुंआहे; आणि आमचे तुमचे आपसांत खुले युध्द आहे.

४) या वचनाने अभिप्रेत, कयामत आहे; किंवा इस्लामचे वर्चस्व, आणि मुसलमानांचा वायदा किंवा तो वायदा जेव्हा अल्लाहकडून तुमच्याविरुध्द युध्द करण्याची मला परवानगी दिली जाईल.

५) म्हणजे अल्लाह्च्या या वचनात उशीर, मला ठाऊक नाही की, तुमच्या परीक्षेसाठी आहे किंवा, एका खास वेळेपर्यंत, फायदा उचलण्यासाठी सवलत देणे आहे.

६) म्हणजे माझ्या बाबतीत तुम्ही ज्या निरनिराळ्या गोष्टी करीत आहांत, किंवा अल्लाह्साठी संतती ठरवतात, या सर्व गोष्टींच्या तुलनेत, तो अल्लाहच दया करणारा आणि तोच मदत करणारा आहे.

آيَاتُهَا ٧٨ | (٢٢) سُوْرَةُ الْحَجِّ مَدَنِيَّةٌ (١٠٣) | رُكُوْعَاتُهَا ١٠

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ ۝

महावाक्ये ७८ | (२२) सू. हज्ज | रुकूअ १०

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يٰٓاَيُّهَا النَّاسُ اتَّقُوْا رَبَّكُمْ ۚ اِنَّ زَلْزَلَةَ السَّاعَةِ شَيْءٌ عَظِيْمٌ ۝١

लोकांनो! आपल्या पालनकर्त्याला भ्या! नि:संशय कयामतचा भूकंप, एक फार मोठी गोष्टआहे. (१)

يَوْمَ تَرَوْنَهَا تَذْهَلُ كُلُّ مُرْضِعَةٍ عَمَّآ اَرْضَعَتْ وَتَضَعُ كُلُّ ذَاتِ حَمْلٍ حَمْلَهَا وَتَرَى النَّاسَ سُكٰرٰى وَمَا هُمْ بِسُكٰرٰى وَلٰكِنَّ عَذَابَ اللّٰهِ شَدِيْدٌ ۝٢

ज्या दिवशी तुम्ही तिला पाहून घ्याल, प्रत्येक स्तनपान करवणारी, आपल्या स्तनपान करणाऱ्या मुलाला विसरून जाईल, आणि सर्व गर्भवतींचे गर्भ पडून जातील. आणि तू पाहशील की लोक धुंद आहेत. परंतु वास्तवात ते धुंद असणार नाही. परंतु अल्लाहची शिक्षाच मोठी कडक आहे.[१] (२)

وَمِنَ النَّاسِ مَنْ يُّجَادِلُ فِي اللّٰهِ بِغَيْرِ عِلْمٍ وَّيَتَّبِعُ كُلَّ شَيْطٰنٍ مَّرِيْدٍ ۙ ۝٣

आणि काही लोक अल्लाहच्या बाबतीत गोष्टी बनवितात, त्यापण ज्ञान नसतांना, आणि शिरजोर दंडेल शैतानाच्या नादी लागून[२] (३)

كُتِبَ عَلَيْهِ اَنَّهٗ مَنْ تَوَلَّاهُ فَاَنَّهٗ يُضِلُّهٗ وَيَهْدِيْهِ اِلٰى عَذَابِ السَّعِيْرِ ۝٤

ज्यावर (दैवात) लिहून दिले गेले आहे[३] की, जो कोणी त्याच्याशी मैत्री करील, तो त्याला बहकवून टाकेन; आणि त्याला नरकाग्नीच्या शिक्षेकडे घेऊन जाईल. (४)

يٰٓاَيُّهَا النَّاسُ اِنْ كُنْتُمْ فِيْ رَيْبٍ مِّنَ الْبَعْثِ فَاِنَّا خَلَقْنٰكُمْ مِّنْ تُرَابٍ ثُمَّ مِنْ نُّطْفَةٍ ثُمَّ مِنْ عَلَقَةٍ ثُمَّ مِنْ مُّضْغَةٍ مُّخَلَّقَةٍ وَّغَيْرِ مُخَلَّقَةٍ لِّنُبَيِّنَ لَكُمْ ۭ وَنُقِرُّ فِي الْاَرْحَامِ مَا نَشَآءُ اِلٰٓى اَجَلٍ مُّسَمًّى ثُمَّ نُخْرِجُكُمْ طِفْلًا ثُمَّ لِتَبْلُغُوْٓا اَشُدَّكُمْ ۚ وَمِنْكُمْ مَّنْ يُّتَوَفّٰى وَمِنْكُمْ مَّنْ يُّرَدُّ اِلٰٓى اَرْذَلِ الْعُمُرِ لِكَيْلَا يَعْلَمَ مِنْ ۢ بَعْدِ عِلْمٍ شَيْـًٔا ۭ وَتَرَى الْاَرْضَ هَامِدَةً فَاِذَآ اَنْزَلْنَا عَلَيْهَا الْمَآءَ اهْتَزَّتْ وَرَبَتْ وَاَنْۢبَتَتْ مِنْ كُلِّ زَوْجٍ ۢ بَهِيْجٍ ۝٥

लोकांनो! जर तुम्हास मेल्यानंतर जिवंत होऊन उठण्यामध्ये शंका आहे, तर विचार करा, आम्ही तुम्हास मातीतून निर्माण केले, मग विर्य बिंदुतून, मग जमलेल्या रक्तांतून, मग मांसाच्या गोळ्यातून, जे स्वरुप दिले गेले होते, आणि ते अर्धवट होते.[४] हे आम्ही तुम्हांवर जाहीर करुन देत आहोत.[६] आणि आम्ही ज्याला इच्छितो, त्याला एका ठरलेल्या वेळेपर्यंत आईच्या पोटांत ठेवतो.[७] मग तुम्हास बाल्यावस्थेत, या जगांत आणतो; कारण की आपल्या भर वयास तुम्ही पोहोचावे. तुमच्यातून काही तर ते आहेत, ज्यांना मृत्यु दिला जातो,[८] आणि काही खडतर वयापर्यंत पालटून नेले जातात की जे एक गोष्ट जाणून घेतल्यानंतर, काहीच समजू उमजू नये.[९] तू पहातोस की, जमीन पडीत आणि कोरडी पडलेली आहे; मग जेव्हा आम्ही तिच्यावर पाऊस पाडतो, तेव्हा ती तरारते आणि लसलसू लागते; आणि हरेक प्रकारची छानदार वनस्पती उगविते[१०] (५)

ذٰلِكَ بِاَنَّ اللّٰهَ هُوَ الْحَقُّ وَاَنَّهٗ يُحْيِ الْمَوْتٰى وَاَنَّهٗ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ۙ ۝٦

हे यासाठी की अल्लाहच सत्य आहे. आणि तोच मृतांना जिवंत करतो. आणि तो प्रत्येक वस्तुंवर सामर्थ्य बाळगणारा आहे. (६)

وَّاَنَّ السَّاعَةَ اٰتِيَةٌ لَّا رَيْبَ فِيْهَا ۙ وَاَنَّ اللّٰهَ يَبْعَثُ مَنْ فِي الْقُبُوْرِ ۝٧

आणि हे की कयामत खचित्‌च येणार आहे; जिच्यात काहीही शंका नाही. आणि खचितच् अल्लाहतआला कबरीवाल्यांना दुसऱ्यादा जिवंत करणार आहे. (७)

وَمِنَ النَّاسِ مَنْ يُّجَادِلُ فِي اللّٰهِ بِغَيْرِ عِلْمٍ وَّلَا هُدًى وَّلَا كِتٰبٍ مُّنِيْرٍ ۙ ۝٨

आणि काही लोक अल्लाहच्या बाबतीत, ज्ञानाशिवाय, आणि मार्गदर्शनाशिवाय, आणिप्रकाशित पुस्तकाशिवाय, वाद घालीत असतात. (८)

✪ याचे मक्की आणि मदनी होण्यात मतभेद आहेत. खरी गोष्ट हीच आहे की, याचा काही भाग मक्की आणि काही मदनी आहे. (फत्हलु कदीर) हा कुरआन शरीफचा एकुलता एक अध्याय आहे, ज्याच्यात दोन सजदे आहेत.

१) सदर महावाक्यात, ज्या भूकंपाचा उल्लेख आहे, ज्याचे परिणाम दुसऱ्या महावाक्यात सांगण्यात आले आहेत. ज्याचा अर्थ लोकांवर फारच भीती, दहशत आणि घबराहटचे लागू होणे आहे. हे कयामतच्या पूर्वी होईल. आणि याच्या बरोबरच जग नष्ट होऊन जाईल. किंवा हे कयामतच्या नंतर, त्यावेळी होईल, जेव्हा लोक कबरीतून उठून, हशरच्या मैदानात जमा होतील. पुष्कळसे भाष्यकार पहिल्या गोष्टीला मान्य करणारे आहेत. जेव्हा की, काही भाष्यकार,

दुसऱ्या मताचे, आणि त्याच्या समर्थनात त्या हदीशी सादर करतात, उदाहरणार्थ अल्लाहतआला आदम ﷺ ला. हुकूम देईल, की त्यांनी आपल्या संततीतून, हजारी, ९९९ नरकाग्नीसाठी, काढून द्यावे ही गोष्ट ऐकून गर्भवतीचे गर्भ पडून जातील. मुले म्हातारी होऊन जातील आणि लोक नशाधुंद झालेसे दिसतील. वास्तविक ते नशाधुंद असणार नाहीत. फक्त शिक्षेची तीव्रता असेल. या गोष्टीने सहाबा फारच भयभीत झाले, त्यांचे चेहरे पांढरे फटक पडले. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी हे पाहून सांगितले, घाबरु नका हे ९९९ याजूज आणि माजूजमधून असतील, आणि तुमच्यातून फक्त एक असेल. तुमची संख्या लोकांमध्ये अशा प्रकारे असेल जसे पांढऱ्या रंगाच्या बैलाच्या बाजुवर काळे केस किंवा काळ्या रंगाच्या बैलाच्या बाजूवर, पांढरे केस असावेत. आणि मला आशा आहे की , स्वर्गवाल्यांमधून तुम्ही, १/४ किंवा एक तृतीयांश किंवा निम्मे असाल ज्याला ऐकून, सहाबाने आनंदित होऊन 'अल्लाहु अकबर'ची गर्जना केली. (स. बुखारी तफसीर सू.हज्ज.) पहिले मत सुध्दा वजनदार आहे. काही जईफ हदीसीने याचे पण समर्थन होते. म्हणून भूकंप आणि त्याची स्थितीने अभिप्रेत जर, भयानकतेची तीव्रता आहे, (आणि उघड असेच आहे) तर फारच घबराट, आणि भयानकतेची ही स्थिती, दोन्ही प्रसंगीपण होईल. म्हणून दोन्हीही मते बरोबर असू शकतात. कारण की, दोन्ही प्रसंगी, लोकांची स्थिती अशी होईल, जशी या महावाक्यात आणि सहीह बुखारीच्या रिवायतमध्ये, सांगितली गेली आहे.

३) उदाहरणार्थ हे की, अल्लाहतआला दुसऱ्यांदा निर्माण करण्याला समर्थ नाही; किंवा त्याला संतती आहे. वगैरे, वगैरे.

४) म्हणजे शैतानाच्या बाबतीत, अल्लाहने लिहिलेल्या प्रारब्धांत ही गोष्ट सिध्द आहे.

५) म्हणजे विर्य बिंदुपासून, चाळीस दिवसानंतर जमलेले रक्त, आणि जमलेल्या रक्तापासून मांसाचा लोथडा, बनून जातो. मांसाच्या लोथड्यापासून ते मूल अभिप्रेत आहे, ज्याचा जन्म होणे स्पष्ट आणि चेहरा मोहरा गोचर होऊन जावा. अशा मुलांत प्राण टाकून दिला जातो, आणि परीपूर्णतेनंतर त्याचा जन्म होतो. आणि 'गैर मुखल्लका' याच्या उलट आहे. ज्याचा चेहरा मोहरा स्पष्ट नसावा, तसेच त्याच्यांत प्राण फुंकला गेला नसेल, आणि वेळे आधीच तो पडून जाईल. सही हदीशींमध्ये सुध्दा, आईच्या गर्भाशयातील या अवस्थेचा (stages) उल्लेख केला गेला आहे. उदा. एका हदीसमध्ये आहे की, विर्यबिंदू, चाळीस दिवसात, जमलेले रक्त बनून जातो. मग चाळीस दिवसानंतर मांसाच्या तुकड्याचा आकार धारण करतो. मग अल्लाहूतआलाकडून एक देवदूत येतो, जो याच्यात प्राण फुंकतो, म्हणजे चार महिन्यानंतर, प्राण फुंकला जातो; आणि मूल एका सुस्पष्ट चेहऱ्यात ढाळले जाते. (स. बुखारी व स.मुस्लिम)

६) म्हणजे अशाप्रकारे आम्ही आपल्या निर्मितीचे सामर्थ्य, तुमच्यासाठी सांगत आहोत.

७) म्हणजे ज्याला पाडून टाकावयाचे असत नाही.

८) म्हणजे पूर्ण वयाच्या पूर्वीच, पूर्ण वयाने अभिप्रेत, तारुण्य किंवा बुध्दी आणि सामर्थ्याची परिपूर्णत: आणि समज उमज पडण्याचे वय ३० ते ४० वर्षाच्या दरम्यान आहे.

९) याच्याने अभिप्रेत, म्हातारपणात, मनुष्याच्या शक्तीत दुर्बलता, आणि वाढत्या वयाबरोबर, बुध्दी आणि स्मरणशक्ती कमी होऊन जाणे. आणि स्मरणशक्ती आणि समज उमजमध्ये, मुलासारखे होऊन जाणे. जसे सू. यासीनमध्ये, व मन् नुअम्मिरुहू, नुनक्किसहुफिल्ल खलकी,' आणि सू. त्तीनमध्ये, ''सुम्मा रद्दनाहु असफल साफेलीन'' ने वर्णन करण्यात आले आहे.

१०) हे मृतांना जिवंत करण्यावर दुसरे प्रमाण आहे. पहिले प्रमाण जे सांगितले गेले, हे होते की, जे व्यक्तीमत्त्व, एका क्षुल्लक पाण्याच्या थेंबापासून, अशा प्रकारे एक मानवी मूर्ती घडवू शकते, आणि एक सुंदर रुप घेऊ शकते. याशिवाय तो त्याला वेगवेगळ्या अवस्थेतून पार पाडून, वृध्दावस्थेच्या अशा स्थितीत पोहचवू शकतो, जेथे याच्या शरीरापासून ते स्मरणशक्ती आणि बुध्दीमत्तेची प्राविण्ये, सर्व कमजोरी आणि दौर्बल्याला बळी पडावेत. काय याच्यासाठी, त्याला दुसऱ्यांदा जीवन प्रदान करणे, कठीण आहे? खचित्च जे व्यक्तीत्व, मनुष्याला या अवस्थांतून पार पाडू शकते, तेच व्यक्तीत्व मेल्यावर सुध्दा, त्याला दुसऱ्यांदा जिवंत करुन, एका नव्या सांच्यात, अस्तित्व प्रदान करु शकते. दुसरे प्रमाण हे दिले आहे की, भूमी पडीत आणि मृत पडलेली असते. परंतु पावसानंतर ही कशाप्रकारे जिवंत, आणि सुपिक, आणि निरनिराळ्या प्रकारची धान्ये, फळफळावळ, आणि रंगबेरंगी फुलांनी संपन्न होऊन जाते. अशाच प्रकारे अल्लाहतआला कयामतच्या दिवशी, मानवांना सुध्दा उठवून उभा करेल. ज्या प्रमाणे हदीसमध्ये आहे. एका सहाबी ؓ नी विचारले, अल्लाहतआला मानवांना ज्याप्रमाणे निर्माण करील, त्याची काही निशाणी सृष्टीत सांगा! नबी ﷺ नी फर्माविले, काय तुमचे जाणे अशा दरीतून झाले आहे, जी कोरडी आणि पडीत आहे, मग दुसऱ्यांदा तिला तरारलेली आणि लसलसलेली पाहिली? त्यांनी सांगितले, होय! आपण ﷺ नी सांगितले बस! अशाच प्रकारे माणसांचे जिवंत होऊन उठणे असेल. (मुसनद अहमद जि. ४ पृ. ११, इब्ने माजा)

ثَانِيَ عِطْفِهِ لِيُضِلَّ عَنْ سَبِيلِ اللَّهِ ۖ لَهُ فِي الدُّنْيَا خِزْيٌ ۖ وَنُذِيقُهُ يَوْمَ الْقِيَامَةِ عَذَابَ الْحَرِيقِ ﴿٩﴾

जो आपला खांदा फिरवणारा[१] बनून, यासाठी की अल्लाहच्या मार्गाहून बहकवावे; त्याची जगात पण फटफजिती होईल; आणि कयामतच्या दिवशी सुध्दा आम्ही त्याला, नरकाग्नीत जळण्याच्या शिक्षेची गोडी चाखवू. ९

ذَٰلِكَ بِمَا قَدَّمَتْ يَدَاكَ وَأَنَّ اللَّهَ لَيْسَ بِظَلَّامٍ لِّلْعَبِيدِ ﴿١٠﴾

हे त्या कर्मांमुळे, जे तुझ्या हाताने पुढे पाठवून ठेवले होते. लक्षात ठेवा की, अल्लाहतआला आपल्या दासांवर जुलुम करणारा नाही. १०

وَمِنَ النَّاسِ مَن يَعْبُدُ اللَّهَ عَلَىٰ حَرْفٍ ۖ فَإِنْ أَصَابَهُ خَيْرٌ اطْمَأَنَّ بِهِ ۖ وَإِنْ أَصَابَتْهُ فِتْنَةٌ انقَلَبَ عَلَىٰ وَجْهِهِ خَسِرَ الدُّنْيَا وَالْآخِرَةَ ۚ ذَٰلِكَ هُوَ الْخُسْرَانُ الْمُبِينُ ﴿١١﴾

आणि काही लोक असे पण आहेत, की, वरवरुनच अल्लाहची भक्ती करतात; जर काही फायदा मिळून गेला, तर त्यात ते समाधान पावतात; आणि जर काही संकट आले, तर त्याचवेळी, तोंड फिरवून घेतात;[२] त्यांनी (इहलोक व परलोक) दोन्ही जगताचे नुकसान करुन घेतले. खरोखर, हाच धडधडीत तोटा आहे. ११

يَدْعُو مِن دُونِ اللَّهِ مَا لَا يَضُرُّهُ وَمَا لَا يَنفَعُهُ ۚ ذَٰلِكَ هُوَ الضَّلَالُ الْبَعِيدُ ﴿١٢﴾

अल्लाहशिवाय त्यांना बोलावित असतात, जे न त्यांना नुकसान पोहचवू शकतात न फायदा. हेच तर पराकाष्टेचे बहकणे आहे. १२

يَدْعُو لَمَن ضَرُّهُ أَقْرَبُ مِن نَّفْعِهِ ۚ لَبِئْسَ الْمَوْلَىٰ وَلَبِئْسَ الْعَشِيرُ ﴿١٣﴾

ते अशांना बोलविता, ज्याचे नुकसान,त्याच्या नफ्यापेक्षांजवळ आहे. खचितच् असे पुरस्कर्तेही वाईट आणि असले सोबतीही वाईट.[३] १३

१) 'सानी' म्हणजे फिरवणारा, अित्फचा अर्थ बाजू आहे. यांच्यात त्या माणसाची स्थिती वर्णन करण्यात आली आहे, जो कुठल्याही बुध्दीसंपन्न आणि नोंदणी केलेल्या प्रमाणाशिवाय, अल्लाहच्या बाबतीत वादविवाद करतो की, तो अहंकाराने आणि आक्षेप घेत, आपली मान मोडतो फिरतो. जसे दुसऱ्या ठिकाणी या स्थितीला, या शब्दांनी वर्णन केले आहे. (सू.लुकमान- ७) (सू.मुनाफिकून-५)(सू.बनी इस्राईल- ८३)

२) 'हरफ' चा अर्थ आहे किनारा. या किनाऱ्यांवर उभा राहणारा, डावा गैल असतो. म्हणजे त्याला निश्चिती अशी नसते. अशा प्रकारे जो मनुष्य धर्माच्या बाबतीत, शंका आणि कुशंकेचा बळी राहतो. त्याची स्थिती पण अशीच असते. त्याला धर्मावर दृढ जमून रहाणे, त्याच्या नशिबी नसते. कारण की त्याची नियत फक्त, ऐहिक फायद्यांवरच असते. मिळत राहिले तर ठीक आहे, नाही तर मग वाडवडीलांचा धर्म, म्हणजे कुफ्र, शिर्ककडे पालटून जातो. याच्या उलट जे खरे मुसलमान असतात, आणि ईमान आणि अल्लाहवर भरोशाने परिपूर्ण असतात. ते कठीण- सोपे पाहिल्याशिवाय, धर्मावर कायम राहतात. त्यांना देणग्या मिळतात, तेव्हा ते आभार मानतात, आणि त्रासांस पडतात, तेव्हा सहनशिलता अंगीकारतात. याच्या अवतरीत होण्या कारणात, एका शंका कुशंकेवाल्या माणसाची गोष्ट पण अशाप्रकारची सांगण्यात आली आहे. (स. बुखारी, भाष्य सू. हज्ज) की, एक मनुष्य मदीनेला येतो, जर त्याच्या घरांत मुले होतील, अशाच प्रकारे जनावरात वाढ होईल, तर म्हणत असे हा धर्म चांगला आहे. जर असे झाले नाही, तर म्हणे हा धर्म वाईट आहे. काही रिवायतीमध्ये हा गुण नवमुस्लिम अरबांचा सांगण्यात आला आहे. (फत्हुलबारी)

३) काही भाष्यकारांजवळ 'यदूऊ' यकूलच्या अर्थात आहे. म्हणजे अल्लाह् शिवाय इतरांचा पुजारी कयामतच्या दिवशी म्हणेल, की ज्यांचे नुकसान, त्याच्या नफ्या पेक्षां, अधिक जवळ आहे. तो पुरस्कर्ता आणि सोबती, खचित्च वाईट आहे. म्हणजे आपल्या उपास्यांच्या बाबतीत म्हणेल; कारण की तेथे त्याच्या आशेचे महाल कोसळून पडतील ज्यांच्या बाबतीत त्याचा विचार होता कीं, ते त्याला अल्लाह्च्या शिक्षेपासून वाचवून घेतील, त्याची शिफारस करतील; तेथे ते उपास्य सुध्दा, त्याच्या बरोबर नरकाग्नीचे इंधन बनलेले असतील. मौलाचा अर्थ पुरस्कर्ता आणि मददगारचा, आणि अशीर चा अर्थ सोबती, साथी आणि नातेवाईकाचा आहे. मददगार आणि साथी तर तो असतो, जो संकटाच्या वेळी कामांस येईल परंतु हे उपास्य स्वत: शिक्षेत पकडले जातील, हे कोणाच्या काय कामा येतील? यासाठी त्यांना वाईट पुरस्कर्ता आणि वाईट साथी, म्हणण्यात आले. त्यांची उपासना नुकसानच नुकसान आहे. नफ्याचा तर त्यांच्यात काहीच भाग नाही. मग हे जे सांगितले गेले कीं, त्यांचे नुकसान, त्यांच्या नफ्यापेक्षा अधिक जवळ आहे; तर हे असेच आहे, जसे दुसऱ्या ठिकाणी सांगण्यांत आले, ''नि:संशय आम्ही(म्हणजे अल्लाह्चे मानणारे) किंवा तुम्ही (त्याला नाकारणारे) सन्मार्गावर आहेत का खुल्या मार्ग भ्रष्टतेत.'' (सू.सबा-२४) उघड गोष्ट आहे कीं, सन्मार्गावर तेच आहेत,जे अल्लाह्ला मानणारे आहेत. परंतु त्याला स्पष्ट शब्दांत सांगण्याच्या ऐवजी, उपहासात्मक अंदाजात सांगितले गेले आहे जे ऐकणाऱ्याला जास्त परिणामकारक, आणि त्याच्या अंत:करणापर्यंत भिडणारे असते. किंवा याचा संबंध या इहलोकाशी आहे; आणि अर्थ हा होईल कीं, अल्लाह्शिवाय इतरांना बोलविल्यामुळे, तात्कालिक नुकसान त्याचे हे होईल कीं, ईमान हातातून चालले गेले, हे जवळचे नुकसान आहे. आणि परलोकांत तर त्याचे नुकसान ठरलेलेच आहे.

إِنَّ اللَّهَ يُدْخِلُ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۚ إِنَّ اللَّهَ يَفْعَلُ مَا يُرِيدُ ﴿١٤﴾

नि:संशय ज्यांनी ईमान आणले आणि चांगली कामे केलीत, अल्लाहतआला त्यांना स्वर्गाच्या भागात घेऊन जाईल, ज्यांच्या खाली पाण्याचे पाट वाहत असतील, अल्लाह जो विचार करतो त्याला करून सोडतो. (१४)

مَن كَانَ يَظُنُّ أَن لَّن يَنصُرَهُ اللَّهُ فِي الدُّنْيَا وَالْآخِرَةِ فَلْيَمْدُدْ بِسَبَبٍ إِلَى السَّمَاءِ ثُمَّ لْيَقْطَعْ فَلْيَنظُرْ هَلْ يُذْهِبَنَّ كَيْدُهُ مَا يَغِيظُ ﴿١٥﴾

ज्याचा हा विचार असेल कीं, अल्लाहतआला आपल्या पैगंबराची मदत दोन्ही जगात करणार नाहीं, त्याने उंच जागेवर एक दोर बांधून कापून घ्यावा. (आपल्या गळ्यांत फास टाकून घ्यावा,) मग पहावे कीं, आपल्या या युक्तीने, ती गोष्ट दूर झाली काय, जिचा त्याला संताप आला होता![1] (१५)

وَكَذَٰلِكَ أَنزَلْنَاهُ آيَاتٍ بَيِّنَاتٍ وَأَنَّ اللَّهَ يَهْدِي مَن يُرِيدُ ﴿١٦﴾

आणि आम्ही अशाच प्रकारे या कुरआनाला,स्पष्ट महावाक्यांत प्रकट केले आहे. ज्याला अल्लाह् इच्छितो त्याला सन्मार्ग दाखवितो. (१६)

إِنَّ الَّذِينَ آمَنُوا وَالَّذِينَ هَادُوا وَالصَّابِئِينَ وَالنَّصَارَىٰ وَالْمَجُوسَ وَالَّذِينَ أَشْرَكُوا إِنَّ اللَّهَ يَفْصِلُ بَيْنَهُمْ يَوْمَ الْقِيَامَةِ ۚ إِنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ شَهِيدٌ ﴿١٧﴾

नि:संशय ईमानवाले, आणि यहूदी, आणि साबी, आणि खिस्ती, आणि अग्नीपूजक[2] आणि मुशरिक[3] लोक, या सर्वांच्या दरम्यान, कयामतच्या दिवशी, स्वत: अल्लाहतआला निर्णय करुन देईल.[4] अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीला साक्ष आहे. [5] (१७)

أَلَمْ تَرَ أَنَّ اللَّهَ يَسْجُدُ لَهُ مَن فِي السَّمَاوَاتِ وَمَن فِي الْأَرْضِ وَالشَّمْسُ وَالْقَمَرُ وَالنُّجُومُ وَالْجِبَالُ وَالشَّجَرُ وَالدَّوَابُّ وَكَثِيرٌ مِّنَ النَّاسِ ۖ وَكَثِيرٌ حَقَّ عَلَيْهِ الْعَذَابُ ۗ وَمَن يُهِنِ اللَّهُ فَمَا لَهُ مِن مُّكْرِمٍ ۚ إِنَّ اللَّهَ يَفْعَلُ مَا يَشَاءُ ۩ ﴿١٨﴾ السجدة

काय तू पहात नाहीस कीं, अल्लाहच्या समोर सर्व सजद्यात आहेत. सर्व आकाशवाले आणि सर्व पृथ्वीवाले, आणि सूर्य व चंद्र, तारे, आणि पर्वत आणि वृक्ष, आणि जनावरे[6] आणि पुष्कळशी मनुष्ये[7] सुध्दा आणि पुष्कळसे असेही पण आहेत ज्यांच्यावर शिक्षा येणे ठरलेलेच आहे;[8] ज्याला अल्लाह् तुच्छ करून टाकेल, तर मग कोणीच त्याला सन्मान देणारा नाही.[9] अल्लाह् जे इच्छितो ते करतो. (१८)

هَٰذَانِ خَصْمَانِ اخْتَصَمُوا فِي رَبِّهِمْ ۖ فَالَّذِينَ كَفَرُوا قُطِّعَتْ لَهُمْ ثِيَابٌ مِّن نَّارٍ يُصَبُّ مِن فَوْقِ رُءُوسِهِمُ الْحَمِيمُ ﴿١٩﴾

हे दोन्ही (पक्ष) आपल्या पालनकर्त्याच्या बाबतीत,मतभेद करणारे[10] आहेत. काफिरांसाठी तर अग्नीचे कपडे बेतविले गेले आहेत आणि त्यांच्या डोक्यावर उकळते पाणी ओतले जाईल; (१९)

يُصْهَرُ بِهِ مَا فِي بُطُونِهِمْ وَالْجُلُودُ ﴿٢٠﴾

ज्याने त्यांच्या पोटांतील सर्व वस्तूंआणि चामड्या गळून पडतील (२०)

وَلَهُم مَّقَامِعُ مِنْ حَدِيدٍ ﴿٢١﴾

आणि त्यांच्या शिक्षेकरता लोखंडाचे हतोडे आहेत. (२१)

كُلَّمَا أَرَادُوا أَن يَخْرُجُوا مِنْهَا مِنْ غَمٍّ أُعِيدُوا فِيهَا وَذُوقُوا عَذَابَ الْحَرِيقِ ﴿٢٢﴾

हे जेव्हा पण, तेथील दु:खामुळे, तेथून निघून पळून जाण्याचा विचार करतील तेथेच परतवून दिले जातील आणि त्यांना (सांगण्यात येईल कीं) जळण्याच्या शिक्षेची[11] गोडी चाखा (२२)

إِنَّ اللَّهَ يُدْخِلُ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ يُحَلَّوْنَ فِيهَا مِنْ أَسَاوِرَ مِن ذَهَبٍ وَلُؤْلُؤًا ۖ وَلِبَاسُهُمْ فِيهَا حَرِيرٌ ﴿٢٣﴾

नि:संशय ईमानवाल्यांना आणि चांगली कामे करणाऱ्यांना, अल्लाहतआला, त्या स्वर्गांमध्ये घेऊन जाईल, ज्यांच्या वृक्षांखालून पाट वाहत असतील, तेथे त्यांना सोन्याची कंकणे घातली जातील, आणि खरे मोतीसुध्दा तेथे त्यांचा पोषाख निव्वळ रेशमाचा असेल.[12] (२३)

وَهُدُوا إِلَى الطَّيِّبِ مِنَ الْقَوْلِ وَهُدُوا إِلَىٰ صِرَاطِ الْحَمِيدِ ﴿٢٤﴾

आणि त्यांना चांगल्या गोष्टीचे मार्गदर्शन करून देण्यात आले[13] आणि त्यांना जो स्तुतीत पात्र आहे, त्याचा मार्ग दाखवून देण्यात आला.[14] (२४)

१) याचा एक अर्थ तर हा केला गेला आहे की, असा मनुष्य, जो असे इच्छितो कीं, अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराची मदत करू नये, कारण की त्याच्या वर्चस्व आणि विजयामुळे त्याला त्रास होतो, तर त्याने आपल्या घराच्या छताला, दोरी लटकावून आणि आपल्या गळ्याला फांस घेऊन, दोरी कापून टाकेल, म्हणजे आपला गळा घोटून घेईल, कदाचित् ही आत्महत्या, त्याला अति क्रोधापासून वाचवून घेईल. जो तो, मोहम्मद ﷺ चा वाढत जाणारा

परिणाम, आणि वाढता प्रभाव पाहून त्याच्या मनात येतो. या स्वरूप 'समाअ' ने अभिप्रेत घराचे छत असेल. दुसरा अर्थ आहे की, तो एक दोर घेऊन आकाशावर चढून जावा आणि आकाशातून जे वह्य किंवा मदत येते त्यांचा क्रम खंडीत करून टाकावा. (जर तो करू शकतो) आणि पहावे कीं काय याच्यानंतर त्याच्या मनाचे समाधान झाले आहे? इमाम इब्ने कसीर नी पहिल्या भावार्थाला, आणि इमाम शौकानीने दुसऱ्या भावार्थाला जास्त पसंत केले आहे. आणि विषयाच्या अनुषंगाने, हाच दुसरा भावार्थ जास्त जवळचा वाटतो.
२) मजूसने अभिप्रेत, इराणचे अग्नीपुजक आहे. जे दोन परमेश्वरांचे मानणारे आहेत. एक अंधाराचा निर्माता, दुसरा प्रकाशाचा ज्याला ते 'अहरमन्' आणि 'यजदाँ' म्हणतात.
३) याच्यांत चर्चित मार्गभ्रष्ट पंथांच्या शिवाय, जितके पण अल्लाह्च्या बरोबर शिर्क करणारे आहेत, सर्व येऊन गेलेत.
४) यांच्यातून सत्यावर कोण आहेत, असत्यावर कोण? हे तर त्या प्रमाणांनी सिध्द होऊन जाते; जे अल्लाह्ने आपल्या कुरआनांत प्रकट केले आहेत; आणि आपल्या शेवटच्या पैगंबराला सुध्दा याच उद्देशाने पाठविले होते. 'लि युजहिर्हु अल्द दिनी कुल्लिही' (सू.फतह -२८) येथे फैसल्याने अभिप्रेत, तो बदला आहे. जो अल्लाहतआला असत्यवादी लोकांना, कयामतच्या दिवशी देईल. या बदल्याने पण स्पष्ट होऊन जाईल, कीं, जगांत सत्यावर कोण होते आणि असत्यावर कोण?
५) हा निर्णय केवळ सत्ताधाऱ्याच्या अधिकाराच्या जोरावर होणार नाही, किंबहुना न्यायानुसार होईल. कारण तो (अल्लाह्) सर्व काही जाणणारा आहे. त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे.
६) काही भाष्यकारांनी या सजद्याने या तमाम वस्तुंचा अल्लाह्च्या आदेशाच्या आधिन होणे, अभिप्रेत धरले आहे. कोणांत ही हिंमत नाहीं कीं, तो अल्लाह्च्या आदेशाकडून तोंड फिरवूंशकेल . त्यांच्या जवळ तो सजदा आज्ञापालन आणि उपासनेला अभिप्रेत नाही, जो फक्त बुध्दी धारण करणाऱ्यांसाठी खास आहे. जेव्हा काही भाष्यकारांनी याला कल्पनेच्या ऐवजी वास्तविकतेवर गणतीत धरला आहे; कीं प्रत्येक सृष्टी, आपआपल्या पध्दतीने अल्लाह्च्या समोर सजद्यांत पडलेली आहे. उदाहरणार्थ मन् फिस् समावात (जे आकाशात आहेत) नें, देवदूत अभिप्रेत आहेत. आणि मन फिल अर्ज (जे जमिनीत आहे) ने, सर्व प्रकारची जनावरे, मनुष्ये, जिन्नात, चतुष्पाद आणि पक्षी, आणि दुसऱ्या वस्तुंआहेत. हे सर्व आपआपल्या पध्दतीने, सज्दा आणि अल्लाह्चे पावित्र्य वर्णन करीत असतात. व इन् मिन शैईन इल्ला युसेब्बहू बिहम्दिही (सू.बनी इसराईल-४४) सूर्य, चंद्र आणि ताऱ्यांचा, विशेष म्हणून उल्लेख केला गेला आहे कीं, मुशरिक लोक यांची उपासना करीत राहिले आहेत. अल्लाहतआलाने सांगितले, तुम्ही यांना सजदा करतात, हे तर अल्लाह्ला सजदा करणारे, आणि त्याच्या अधिन आहेत म्हणून तुम्ही त्यांना सजदा करू नका; त्या व्यक्तीत्वाला सजदा करा, जो यांचा सृष्टीकर्ता आहे. (हा मीम सज्दा- ३७)
७) हा सजदा, आज्ञापालन आणि उपासनेचाच आहे. ज्याला मानवांची एक मोठी संख्या, करत असते. आणि अल्लाह्च्या प्रसन्नतेला पात्र ठरते.
८)हे ते आहेत, जे आज्ञापालनाच्या सजद्याला नकार देऊन, 'कुफ्र' चा अंगीकार करतात. नाही तर तकविनी आदेशांत, सजद्याच्या अधिन होण्यांत त्यांना पण नकार देण्याची हिंमत नाहीं.
९) 'कुफ्र' अंगीकारण्याचा परिणाम अप्रतिष्ठा आणि फजिती, आणि परलोकांतील कायमची शिक्षा आहे; जिच्यापासून वाचवून, काफिरांना प्रतिष्ठा देणारा कोणी नाहीं.
१०) हाजानी खसमानी काहींनी याच्याने अभिप्रेत, चर्चित मार्गभ्रष्ट पंथ, आणि त्याच्या तुलनेत दुसरा पंथ, मुसलमान घेतला आहे. हे दोघे, आपल्या पालनकर्त्याच्या बाबतीत झगडत असतात, मुसलमान तर त्याच्या एक होण्याला, आणि त्याच्या पुन्हा जिवंत करून उठवण्याला, मानतात. जेव्हांकी दुसरे अल्लाह्च्या बाबतीत वेगवेगळ्या मार्गभ्रष्टतेत व्यस्त आहेत. या संदर्भात, बद्रच्या युध्दांत लढणारे मुसलमान आणि काफिरपण येऊन जातात. ज्याच्या सुरवातीला, मुसलमानांत एका बाजूला, ह. हमजा, ह. अली आणि उबैदा ﷺ होते. आणि दुसरीकडे यांच्या मुकाबल्यासाठीं, काफिरांमध्ये उतबा शैबा आणि वलीद बिन उतबा होते.(स.बुखारी तफसीर सू. हज्ज) इमाम इब्ने कसीर म्हणतात, हे दोन्ही भावार्थ बरोबर आणि महावाक्याप्रमाणे आहे.
११) यांच्यात नर्कवासीयांच्या काही शिक्षांचा तपशील देण्यांत आला आहे, जी त्यांना तेथे भोगावी लागणार आहे.
१२) नर्कवासीयांच्या तुलनेत, हा स्वर्गवासीयांचा आणि त्यांना देण्यांत येणाऱ्या देणग्यांची चर्चा आहे, ज्या ईमानवाल्यांना देण्यांत येतील.
१३) म्हणजे स्वर्ग अशी जागा आहे, जेथे पवित्र गोष्टीच होतील. तेथे निरर्थक आणि पापांची गोष्ट होणार नाही.
१४) म्हणजे अशा जागेकडे, जेथे चोहोंबाजूने, अल्लाह्ची स्तुती आणि पावित्र्य वर्णनाचा, आवाज गुंजत असेल. जर याचा संबंध इहलोकांशी असेल, तर याचा अर्थ कुरआन आणि इस्लाम कडें मार्ग दर्शन आहे; जे ईमानवाल्यांच्या वाट्याला येते.

إِنَّ الَّذِينَ كَفَرُوا وَيَصُدُّونَ عَن سَبِيلِ اللَّهِ
وَالْمَسْجِدِ الْحَرَامِ الَّذِي جَعَلْنَاهُ لِلنَّاسِ سَوَاءً
الْعَاكِفُ فِيهِ وَالْبَادِ ۚ وَمَن يُرِدْ فِيهِ بِإِلْحَادٍ
بِظُلْمٍ نُّذِقْهُ مِنْ عَذَابٍ أَلِيمٍ ٢٥

**नि:संशय ज्या लोकांनी 'कुफ्र' केले आणि अल्लाहच्या मार्गांत अडथळा आणला; आणि या प्रतिष्ठित मशीदी पासून[१] पण, जिला आम्ही सर्व लोकांसाठी, एक सारखे (प्रार्थना गृह) ठरविले आहे, मग ते तेथलेच रहाणारे असोत, किंवा बाहेरचे असोत;[२] जो पण खोडसाळ पणाने अडथळा करण्याचा इरादा करेल;[३] आम्ही त्याला दु:ख दायक शिक्षेची गोडी चाखवूं[४] (२५)**

وَإِذْ بَوَّأْنَا لِإِبْرَاهِيمَ مَكَانَ الْبَيْتِ أَن لَّا تُشْرِكْ
بِي شَيْئًا وَطَهِّرْ بَيْتِيَ لِلطَّائِفِينَ وَالْقَائِمِينَ
وَالرُّكَّعِ السُّجُودِ ٢٦

**आणि जेव्हांकीं, आम्ही इब्राहीमला काब्याच्या घराची जागा निश्चित् करून दिली[५] या अटीवर कीं, माझ्या बरोबर कोणाला सरकतदार करू नये;[६] आणि माझ्या घराला, तवाफ, (प्रधक्षिणा) कयाम (थांबून रहाणे) रुकूअ (अर्धनमन) सजदा करणाऱ्यांसाठीं, पाक साफ ठेवावे.[७] (२६)**

وَأَذِّن فِي النَّاسِ بِالْحَجِّ يَأْتُوكَ رِجَالًا وَعَلَىٰ
كُلِّ ضَامِرٍ يَأْتِينَ مِن كُلِّ فَجٍّ عَمِيقٍ ٢٧

**आणि लोकांमध्ये हज्जची घोषणा कर. लोक तुझ्या जवळ पायी पायीं सुध्दा येतील, आणि रोडक्या तोडक्या उंटांवर सुध्दा[८] दुरवरच्या सर्व मार्गांनी येतील.[९] (२७)**

لِّيَشْهَدُوا مَنَافِعَ لَهُمْ وَيَذْكُرُوا اسْمَ اللَّهِ فِي
أَيَّامٍ مَّعْلُومَاتٍ عَلَىٰ مَا رَزَقَهُم مِّن بَهِيمَةِ
الْأَنْعَامِ ۖ فَكُلُوا مِنْهَا وَأَطْعِمُوا الْبَائِسَ الْفَقِيرَ ٢٨

**आपले फायदे मिळविण्याकरता येऊन जावे;[१०] आणि या नियमित केलेल्या दिवसांत, पाळलेल्या चतुष्पादांवर,[११] अल्लाहचे नाव घ्यावे. मग तुम्हीं, त्यातून स्वत: सुध्दा खा, आणि उपाशी मोतादांना पण खाऊ घाला. (२८)**

ثُمَّ لْيَقْضُوا تَفَثَهُمْ وَلْيُوفُوا نُذُورَهُمْ وَلْيَطَّوَّفُوا
بِالْبَيْتِ الْعَتِيقِ ٢٩

**मग त्यांनी आपल्या अंगावरील मळ दूर करावा.[१२] आणि आपले नवस पूर्ण करावे.[१३] आणि अल्लाहच्या (या) पुरातन घराचा तवाफ (प्रदक्षिणा) करावा.[१४] (२९)**

१) अडथळा आणणाऱ्यांनी अभिप्रेत, मक्केचे काफिर आहेत. ज्यांनी ६ हिजरीमध्ये, मुसलमानांना मक्केला जाऊन उमरा करण्याला मना केले होते. आणि मुसलमानांना हुदैबियाहून परत यावे लागले होते.

२) याच्यात मतभेद आहे कीं, मस्जिदे हरामने अभिप्रेत खास मशीद (खाना-ए-काबा) च आहे कीं, पूर्ण हरमे मक्का. कारण कीं कुरआनामध्ये, काही ठिकाणी पूर्ण हरमे मक्की करितां, सुध्दा मसजिदे हराम चा शब्द वापरण्यांत आला आहे. जेथपावेतो खास मस्जिदे हरामचा संबंध आहे, याच्या बाबतीत तर ही गोष्ट एकमत झालेली आहे कीं, येथे राहणारे आणि येथे न राहणारे, मुलकी आणि आफाकीं, सर्वांचा वाटा समान आहे. म्हणजे कुठलाही भेदाभेद केल्याशिवाय, प्रत्येक मनुष्य, रात्र आणि दिवसाच्या कुठल्याही भागांत उपासना करूंशकतो. कोणाला पण, कोण्या मुसलमानाला उपासना करण्यापासून मना करण्याची परवानगी नाही. तथापि ज्या धर्म पंडितांनी, मस्जिदे हरामने अभिप्रेत, पूर्ण हरम शरीफ धरला आहे, त्यांच्या एका गटाचे मत हे आहे. कीं, पूर्ण हरमे मक्की, सर्व मुसलमानांसाठी समान योग्यता ठेवतो. आणि त्याच्या इमारती आणि जमिनीचा कोणी मालक नाही. म्हणून यांची खरेदी विक्री, आणि त्यांना भाड्याने देणे, त्यांच्याजवळ योग्य नाही. म्हणून पण कोण्या स्थळावरून हज्ज किंवा उमऱ्यांसाठी जाईल, तर त्याला हा हक्क प्राप्त आहे कीं, तो जेथे इच्छिल तेथे त्याने थांबून जावे. तेथे राहणाऱ्यांची जबाबदारी आहे की त्यांनी आपल्या घरात थांबण्यापासून कोणाला मना करु नये. दुसरे मत हे आहे की, इमारती आणि जमिनी खास संपत्ती, होऊं शकतात. आणि यांच्यात मालकी फेर बदल, म्हणजे विकणे, भाड्याने देणे, योग्य आहे, तथापि ती स्थळे, ज्यांचा संबंध, मनासिके हज्ज बरोबर आहेत. उदा.मीना, मुसद्लेफा आणि अरफात ची मैदाने, ही सर्वांसाठी वक्फ आहेत. यांच्यात कोणाची मालकी योग्य नाहीं. ही समस्या, पुर्वींचे धर्मशास्त्रीच्या दर्म्यान, खास वादविवादाला कारणीभूत राहिली आहे. तथापि आजकाल, जवळ जवळ सर्वच्या सर्व धर्मपंडित, ही खास मालकी हक्काला मान्यता देणारे होऊन गेले आहेत. आणि ही समस्या मुळांतच वादविवाद पूर्णच राहिली नाही. मौलाना मुफ्ती मोहम्मद शफीअ मरहूमने पण, इमाम अबु हनीफा, आणि धर्मशास्त्रींचा अधिकाराचा मसलक यालाच ठरविले आहे. (कृपया पहावे मआरूफुल कुरआन जि. ६ पृ. २५३)

३) इल्हादचा शाब्दिक अर्थ तर वाकडी चाल चालण्याचा आहे. येथे हा सर्वसाधारण, कुफ्र आणि शिर्कपासून होऊन

प्रत्येक गुन्ह्यासाठी वापरला आहे. तरी सुध्दा काही धर्मपंडित, कुरआनी शब्दांना पुढे ठेवून, या गोष्टीला पण मान्य करतात कीं, हरममध्ये जर कोण्या पापकर्माचा इरादा जरी करून घेईल, (मग जरी त्यावर अंमल बजावणी करू न शकेल) तर तो पण या धमकावणीत शामील आहे. काही म्हणतात कीं निव्वळ इराद्यावर पकड होणार नाही, जसे की कुरआनाच्या दुसऱ्या स्पष्ट महावाक्यांनी (नसूस) स्पष्ट आहे. तथापि इरादा जर, पूर्ण प्रयत्न करण्याच्या मर्यादेपर्यंत, असेल तर पकड करण्याला योग्य होऊं शकतो. (फत्हुलकदीर)

४) हा बदला आहे त्या लोकांचा जे चर्चित गुन्हे करणारे असतील.

५) म्हणजे बैतुल्लाह्ची जागा दाखवून दिली आणि आम्ही तेथे इब्राहीमच्या संततीला आणून वसविले. याच्याने ठाऊक होते कीं, नूहच्या वादळाच्या ओसाड झाल्यानंतर, खाना-ए-काबाचे बांधकाम, सर्वप्रथम ह. इब्राहिम عليه السلام च्या हाताने झाले आहे. जसे की सहीह हदीसने पण सिद्ध आहे, ज्यात नबी ﷺ नी फर्माविले, ''सर्वात प्रथम मशीद जी जमिनीवर बनविण्यात आली मसजिदे हराम आहे आणि याच्या चाळीस वर्षानंतर मस्जिदे अक्सा बांधली गेली.'' (मुसनद अहमद, १५०/५, -१६७ आणि स. मुस्लिम)

६) हा खाना ए काबाच्या बांधण्याचा उद्देश्य सांगितला कीं, यांच्यात फक्त माझीच उपासना केली जावी. याच्याने हे सांगण्याचा उद्देश्य आहे कीं, मुशरिक लोकांनी याच्यांत ज्या मूर्त्या सजवून ठेवल्या आहेत; ज्यांची ते येथे येऊन उपासना करतात. हा निव्वळ जूलुम आहे,. कीं जेथे फक्त अल्लाह्ची उपासना केली पाहीजे, तेथे मूर्तींची उपासना केली जाते.

७) 'कुफ्र' 'मूर्तीपुजा' आणि दुसऱ्या दुर्गंधीत, आणि घाणेरड्या गोष्टींपासून. येथे उल्लेख, फक्त नमाज पढणाऱ्यांचा, तवाफ करणाऱ्यांचा केला आहे. कारण की या दोन्ही उपासना खाना-ए-काबासाठी खास आहेत. नमाजीमध्ये तोंड त्याच्याचकडे केले जाते. आणि तवाफ फक्त त्याच्या इर्द गिर्द केला जातो. परंतु बिदअती लोकांनी आता पुष्कळशा कबरींचा तवाफ पण शोधून काढला आहे. आणि काहीं नमाजीसाठी 'किबला'' पण आणखी कोणी. अआजनल्लाहु मिनहुमा!

८) जे चाऱ्याची कमतरता, आणि लांबचा प्रवास, आणि थकव्याने अशक्त आणि दुबर्ल, होऊन जातील.

९) हे अल्लाहतआलाचे सामर्थ्य आहे कीं, मक्केच्या पर्वताच्या शिखरावरून, उंच होणारा हा दुर्बल आवाज, जगाच्या काना कोपऱ्यांत पोहचून गेला. ज्याला हज आणि उमरा मध्ये, प्रत्येक हाजी आणि उमरा करणारा, प्रत्यक्ष, पाहत असतो.

१०) हे फायदे धार्मिक पण आहेत, की नमाज, तवाफ, आणि हज आणि उमऱ्याच्या मनासिकच्या मार्फत अल्लाहकडून क्षमा दान आणि त्याची प्रसन्नता प्राप्त केली जावी. आणि ऐहिक सुध्दांकीं, व्यापार आणि कारभारामुळे, संपत्ती आणि ऐहिक साधने प्राप्त होऊन जावेत.

११) बहीमतुल अन्आम (पाळीव चतुष्पाद) ने अभिप्रेत उंट, गाय, बकरी आणि मेंढी आणि दुंबे आहेत. यांच्यावर अल्लाहचे नाव घेण्याचा अर्थ त्यांना जबाह करणे आहे, जे अल्लाह्चे नाव घेऊनच केले जाते; आणि अय्यामे मालूमातने अभिप्रेत, जबाह करणेचे दिवस,अय्यामे तशरीक आहेत; जो यौमे नहर, (१० जिल्हज्जा) आणि तीन दिवस त्याच्यानंतर आहेत; म्हणजे ११,१२ व १३ जिल्हज्जा, पर्यंत कुरबानी केली जाऊं शकते. सर्व साधारणपणे, अय्यामे मअलूमातने जिल्हज्जाचे पहिले १० दिवस, आणि अय्यामे मअ्दुदातने, अय्यामे तशरीक अभिप्रेत धरले जातात. तथापि येथे मअलुमात ज्या संदर्भात आला आहे, याच्याने हेच ठाऊक होते कीं, येथे अय्यामे तशरीक अभिप्रेत आहेत. वल्लाह् अअलम.

१२) म्हणजे १० जिल्हज्जाला जमराए कुबरा(अकबा) ला खड्या मारल्यानंतर, हाजीला पहिली किंवा छोटी सुटका मिळून जाते. ज्याच्यानंतर तो एहराम सोडून टाकतो आणि पत्नीशी समागमाशिवाय, दुसरी ती सर्व कामें, त्याच्यासाठी करणे, योग्य होऊन जातात. जी एहरामच्या अवस्थेत मना असतात. मळ दूर करण्याचा अर्थ हाच आहे कीं, मग त्याने केस आणि नखे कापून घ्यावीत; तेल आणि सुगंधाचा वापर करावा; आणि शिवलेले कपडे घालून घ्यावे; वगैरे.

१३) जर काही नवस मानला असेल, जसे लोक नवस करतात, कीं जर अल्लाह्ने आम्हांस आपल्या पवित्र घराचे दर्शन घडविले, तर आम्ही अमूक अमूक नेकीचे काम करूं.

१४) अतीकचा अर्थ पुरातनचा आहे. अभिप्रेत खाना ए काबा आहे. की केस साफ केल्यानंतर किंवा कमी केल्यानंतर, तवाफे इफाजा करून घ्यावा, ज्याला तवाफे जियारत सुध्दा म्हणतात. जे हजचे एक रूक्न आहे. जे उकूफे अर्फात, आणि जूमरा-ए- उकबा ला खड्या मारल्यानंतर केले जाते. जेव्हा की, तवाफे=कुदूम काहींजवळ वाजीब आणि काहींजवळ सुन्नत आहे. आणि तवाफे विदा सुन्नते मुवक्केदा (किंवा वाजीब) आहे. जो बहुतेक ज्ञान बाळगणाऱ्यांपासून सुटून जातो, जसे ऋतुमती झालेल्या स्त्रीकडून कधीं कधी सुटून जातो. (अयसरत् तफासीर)

ذٰلِكَ ۚ وَمَنۡ يُّعَظِّمۡ حُرُمٰتِ اللّٰهِ فَهُوَ خَيۡرٌ لَّهٗ عِنۡدَ رَبِّهٖ ؕ وَاُحِلَّتۡ لَـكُمُ الۡاَنۡعَامُ اِلَّا مَا يُتۡلٰى عَلَيۡكُمۡ فَاجۡتَنِبُوا الرِّجۡسَ مِنَ الۡاَوۡثَانِ وَاجۡتَنِبُوۡا قَوۡلَ الزُّوۡرِ ۙ‏ ﴿۳۰﴾

हे आहे, आणि जो कोणी अल्लाहच्या सन्माननीय[१] वस्तुंचा आदर व महिमा ठेवेल, तर हे त्याच्या पालनकर्त्या समीप, त्याच्या करीता उत्तम आहे. आणि तुमच्या करीता चतुष्पाद जनावरे हलाल (विहीत) करून देण्यांत आली आहेत; त्यांच्याशिवाय, जी तुमच्या समोर[२] सांगण्यात आली आहेत. बस तुम्हांस मूर्तींच्या घाणीपासून वाचत राहिले पाहिजे[३] आणि खोटे बोलण्यापासून पण (स्वत:ला) वाचविले पाहिजे.[४] ३०

حُنَفَآءَ لِلّٰهِ غَيۡرَ مُشۡرِكِيۡنَ بِهٖ ؕ وَمَنۡ يُّشۡرِكۡ بِاللّٰهِ فَكَاَنَّمَا خَرَّ مِنَ السَّمَآءِ فَتَخۡطَفُهُ الطَّيۡرُ اَوۡ تَهۡوِىۡ بِهِ الرِّيۡحُ فِىۡ مَكَانٍ سَحِيۡقٍ‏ ﴿۳۱﴾

अल्लाहच्या एकच होण्याला मानून,[५] त्याच्याबरोबर कोणाला सरकतदार न ठरवितां. ऐका! अल्लाहच्या बरोबर सरकतदार करणारा, जणू आकाशांतून पडून गेला; आता एक तर त्याला पक्षी उचलून घेऊन जातील, किंवा वारा (त्याला) कोण्या लांब वरच्या जागी फेकून देईल[६] ३१

ذٰ لِكَ وَمَنۡ يُّعَظِّمۡ شَعَآئِرَ اللّٰهِ فَاِنَّهَا مِنۡ تَقۡوَى الۡقُلُوۡبِ‏ ﴿۳۲﴾

(हे ऐकले!) आता आणखी ऐका!! अल्लाहच्या निशाण्यांचा जो आदर सन्मान करील, तर हे त्याच्या अंत:करणाच्या भयाने (द्योतक) आहे.[७] ३२

१) या निशाण्यांनी (हुरमतने) अभिप्रेत, ते मनासिक हज्ज आहेत; ज्यांचा तपशील आता केला गेला. त्यांच्या सन्मानाचा अर्थ, त्यांना अशाप्रकारे अदा करणे आहे, ज्याप्रमाणे दाखविण्यांत आले आहे. म्हणजे यांच्या विरूध्द करून, त्यांच्या प्रतिष्ठेला माती मोल न करावे.

२) ''जे वर्णन करण्यात आले आहे.'' चा अर्थ आहे, ज्यांचे निषीध्द (हराम) होणे सांगून दिले गेले आहे, जसे महावाक्य, ''हुर्रीमत् अलैकुमुल मयततु वद् दमु'' अल् आयात मध्ये तपशील आहे.

३) 'रिज्सुन' चा अर्थ घाण आणि पलीदचा आहे. येथे याच्याने अभिप्रेत लाकूड किंवा लोखंड किंवा आणखी कोण्या वस्तुंपासून बनविलेल्या मूर्ती आहेत. अर्थ हा आहे कीं, अल्लाह्ला सोडून, आणखी कोणाची उपासना करणे, ही घाणेरडी गोष्ट आहे. आणि अल्लाह्च्या प्रकोपाला आणि अप्रसन्नतेला कारणीभूत आहे. यापासून वांचा.

४) खोट्या गोष्टीत, खोट्या गोष्टी शिवाय, खोटी शपथ पण आहे. (जिला हदीसमध्ये, शिर्क, आणि आईबापाच्या हक्कानंतर, तिसऱ्या नंबरच्या कबीरा गुन्हयांत शामील केले आहे.) आणि सर्वांत मोठे खोटे, हे आहे कीं, अल्लाह् ज्या गोष्टींकडून पवित्र आहे, त्या त्याच्याकडे लावल्या जाव्यात. उदाहरणार्थ, अल्लाह्ची संतती आहे. अमूक बुजूर्ग, अल्लाह्च्या अखत्यारांत भागीदार आहे. किंवा अमूक कामावर अल्लाह् कसा समर्थ होणार! जसे काफिर मृत्यूनंतर पुन्हा जिवंत होऊन उठण्याबर आश्चर्य व्यक्त करीत राहिले आहे, आणि करीत असतात. किंवा आपल्या कडून, अल्लाह्च्या विहीत केलेल्या वस्तूंना निषीध्द, आणि निषीध्द वस्तूंना विहीत करून घेणे; जसे मुशरिक लोक, बहीरा, सायबा, वसीला आणि हाम जनावरांना आपल्यावर निषीध्द करून घेत असत. हे सर्व खोटे आहे याच्यापासून वांचणे आवश्यक आहे.

५) हुनफाअ हनीफचे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ आहे, एखाद्या गोष्टीकडे वळणे, एका बाजुला होणे. एकाचकडे होणे, म्हणजे शिर्ककडून तौहीद कडे, आणि असत्याकडून, इस्लाम आणि सत्य धर्माकडे वळून, किंवा एकाच बाजुला होऊन, फक्त अल्लाह्चीच उपासना करीत असतांना.

६) म्हणजे ज्या प्रमाणे मोठे पक्षी, छोट्या प्राण्यांना, फारच जोराने झटका मारून, त्यांना टोचून खाता, किंवा वारा कोणाला लांबवरच्या जागी फेकून देतो; आणि कोणाला याचा पत्ता पण लागू नये; दोन्ही प्रकारांत तबाह बर्बाद होणे त्याच्या दैवांत आहे. अशाच प्रकारे तो मनुष्य, जो फक्त एका अल्लाह्ची उपासना करतो आहे. तो नैसर्गिक संरक्षण आणि मनाच्या पावित्र्याच्या अनुषंगाने, तो अत्युच्च स्थानावर जातो. आणि जसा तो शिर्क करू लागतो, तर जणूं आपल्याला अति उंचीवरून खोलांत, आणि पावित्र्यापासून, घाण आणि चिखलांत फेकून घेतो.

७) शआईर, शईरतुन अनेकवचन आहे; ज्याचा अर्थ चिन्ह आणि निशाणीचा आहे. जसा युध्दांत एक चिन्ह (खास शब्द निशाणी म्हणून) अंगिकारले जाते. ज्याच्याने ते आपसांत एक दुसऱ्याला ओळखतात. या अनुषंगाने शआईरल्लाह् ते आहे जे धर्माचे चिन्ह, म्हणजे इस्लामचे ठळक, विशेष आदेश आहेत. ज्याच्याने एका मुसलमानाची वेगळी शान कायम होते. आणि दुसऱ्या धर्मवाल्यांकडून वेगळा ओळखला जातो. सफा आणि मर्वा डोंगरांना पण याचसाठी शआईरील्लाह म्हटले गेले आहे. कीं मुसलमान हज्ज आणि उमरा यांच्यात, यांचे दर्म्यान सअी करतात. येथे हजचे दुसरे मनासिक, विशेषत: कुरबानीच्या जनावरांना शआईरील्लाह् म्हणण्यांत आले आहे. त्यांच्या सन्मानाचा अर्थ त्यांना चांगले समजणे, आणि पुण्याचे काम आहे, असे समजणे, असा आहे. म्हणजे उत्कृष्ठ आणि मोठे टवटवीत जनावर कुरबान करणे. या सन्मानाला अंत:करणाचे ईशभय ठरविले गेले आहे. म्हणजे मनाच्या त्या कामांतून आहे, ज्यांचा आधार ईशभयावर आहे.

ع ٤ ٨ ١١

لَكُمْ فِيْهَا مَنَافِعُ اِلٰٓى اَجَلٍ مُّسَمًّى ثُمَّ مَحِلُّهَآ
اِلَى الْبَيْتِ الْعَتِيْقِ ﴿٣٣﴾

यांच्यात तुमच्यासाठी एका निश्चित वेळेपर्यंत फायदा आहे.[१] मग त्यांच्या हलाल होण्याची जागा खाना-ए-काबा आहे.[२] ३३

وَلِكُلِّ اُمَّةٍ جَعَلْنَا مَنْسَكًا لِّيَذْكُرُوا اسْمَ اللّٰهِ عَلٰى
مَا رَزَقَهُمْ مِّنْ بَهِيْمَةِ الْاَنْعَامِ ؕ فَاِلٰهُكُمْ اِلٰهٌ
وَّاحِدٌ فَلَهٗٓ اَسْلِمُوْا ؕ وَبَشِّرِ الْمُخْبِتِيْنَ ﴿٣٤﴾

आणि प्रत्येक उम्मतसाठी, आम्ही उपासनेच्या पध्दती निश्चित करून दिल्या आहेत; कारण कीं, त्यांनी या चतुष्पाद जनावरांवर, अल्लाह्चे नाव घ्यावे; जे अल्लाह्ने त्यांना देऊन ठेवले आहेत;[३] जाणून घ्या कीं, तुम्हा सर्वांचा खरा उपास्य, फक्त एकच आहे, तुम्ही त्याच्या आज्ञांकित होऊन जा आणि विनयशिलता करणाऱ्यांना शुभ सूचना ऐकवून द्या ३४

الَّذِيْنَ اِذَا ذُكِرَ اللّٰهُ وَجِلَتْ قُلُوْبُهُمْ وَالصّٰبِرِيْنَ
عَلٰى مَآ اَصَابَهُمْ وَالْمُقِيْمِي الصَّلٰوةِ ۙ وَمِمَّا رَزَقْنٰهُمْ
يُنْفِقُوْنَ ﴿٣٥﴾

त्यांना जेव्हा कीं अल्लाह्चे नाव घेतले जाते, त्यांची अंतकरणे भयभीत होऊन जातात. त्यांना जे संकट पोहचते त्यावर सहन करतात. नमाजीचे कायम करणारे आहेत. आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे, त्यातून खर्च करीत असतात. ३५

وَالْبُدْنَ جَعَلْنٰهَا لَكُمْ مِّنْ شَعَآئِرِ اللّٰهِ لَكُمْ
فِيْهَا خَيْرٌ ۖ فَاذْكُرُوا اسْمَ اللّٰهِ عَلَيْهَا صَوَآفَّ ۚ
فَاِذَا وَجَبَتْ جُنُوْبُهَا فَكُلُوْا مِنْهَا وَاَطْعِمُوا
الْقَانِعَ وَالْمُعْتَرَّ ؕ كَذٰلِكَ سَخَّرْنٰهَا لَكُمْ
لَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿٣٦﴾

कुरबानीचे उंट,[४] आम्ही तुमच्यासाठीं, अल्लाह्तआलाच्या निशाण्या म्हणून, निश्चित करून दिले आहेत.त्यांच्यात तुम्हांस फायदा आहे. मग त्यांना उभे करून, अल्लाह्च्या नावावर जबाह करा.[५] मग जेव्हा त्यांच्या कुशी जमिनीला लागून जातील;[१] तेव्हा स्वत:पण[२] खा; स्वाभिमानी गोरगरीबांस आणि मागणाऱ्या (गोरगरीबांस) पण खाऊं घाला.[३] अशाच प्रकारे आम्ही चतुष्पादांना तुमच्या अधिन करून दिले आहे कीं, तुम्ही आभार मानावेत. ३६

لَنْ يَّنَالَ اللّٰهَ لُحُوْمُهَا وَلَا دِمَآؤُهَا وَلٰكِنْ
يَّنَالُهُ التَّقْوٰى مِنْكُمْ ؕ كَذٰلِكَ سَخَّرَهَا لَكُمْ
لِتُكَبِّرُوا اللّٰهَ عَلٰى مَا هَدٰىكُمْ ؕ وَبَشِّرِ الْمُحْسِنِيْنَ ﴿٣٧﴾

अल्लाह्तआलाला कुरबानीचे मांस पोहचत नाही, न त्याचे रक्त; परंतु त्याला तर तुमच्या मनाचे ईशभय पोहचते; अशाच प्रकारे अल्लाह्तआलाने या जनावरांना तुमच्या अधिन करून दिले आहे. कीं तुम्ही त्याच्या मार्गदर्शनाच्या आभारार्थ त्याचा महिमा व गौरव करावा. आणि सुकृत्य करणाऱ्यांना शुभवार्ता ऐकवून द्या. ३७

१) तो फायदा, स्वारी, दूध, आणखी उत्पत्ती आणि लोकर वगैरेचे प्राप्त करणे आहे. ठराविक वेळेने अभिप्रेत, नहर(जबाह करणे) आहे. म्हणजे जबाह होईपर्यंत, तुम्हांस त्यांचेकडून चर्चित फायदे मिळतात. याच्याने ठाऊक झाले कीं, कुरबानीच्या जनावरांकडून, जोपर्यंत ते जबाह न केले जातील, फायदा उचलणे रास्त (जाएज) आहे. सहीह हदीसने पण याचे समर्थन होते. एक मनुष्य, आपल्या कुरबानीचे जनावर, आपल्या बरोबर हांकून नेत होता. नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी त्याला सांगितले, त्यावर स्वार होऊन जा! त्याने सांगितले ही हज्जची कुरबानी आहे. आपण सल्ल. नी फर्माविले, त्यावर स्वार होऊन जा!(स. बुखारी)

२) हलाल होण्याने अभिप्रेत, जेथे त्यांचे जबाह करणे, हलाल असते. म्हणजे ही जनावरे, मनासिके हज्ज अदा केल्यानंतर,बैतुल्लाह् आणि मक्केच्या हरममध्ये पोंहचतात, आणि तेथे अल्लाह्च्या नावावर जबाह केले जातात.मग चर्चित फायद्यांचा क्रम पण खंडीत होऊन जातो. आणि जर ते तसेच, हरमसाठी 'हदी' होतात, तर हरम मध्ये पोहचताच, जबाह करून टाकण्यांत येतात. आणि मक्केच्या फकीरांमध्ये त्यांचे मांस वाटून टाकण्यांत येते.

३) 'मनसक' अर्थ आहे, अल्लाह्च्या जवळीकसाठी कुरबानी करणे. 'जबीहा' (जबाह केलेले जनावर)ला सुध्दां, 'नसीका' म्हणण्यांत येते ज्यांचे अनेक वचन 'नूसुक' आहे. याचा अर्थ आज्ञापालन आणि उपासनेचा पण आहे. कारण कीं, अल्लाह्च्या प्रसन्नतेसाठीं, जनावराची कुरबानी करणे पण उपासना आहे. याचसाठी गैरूल्लाह्च्या नांवावर, किंवा त्यांच्या प्रसन्नतेसाठी, जनावर जबाह करणे, गैरूल्लाह्ची उपासना आहे. याच्यानेच मनासिके हज्ज आहे. म्हणजे त्या जागा, जेथे हज्जची कर्मे आणि अर्कान, अदा केले जातात. जसे, अरफात, मुजदल्फा, मिना, आणि मक्का. सर्व हज्जची कर्मे आणि अर्कान यांना पण मनासिक म्हणून घेतले जाते. महावाक्याचा अर्थ हा आहे कीं, आम्ही पूर्वी सुध्दां, प्रत्येक धर्मवाल्यांसाठी, जबाह करण्याचा किंवा उपासनेची पध्दत निश्चित करीत आलो आहोत. कारण कीं त्यांनी याच्या

मार्फत अल्लाह्ची जवळीक साधत रहावी. आणि यांच्यात प्रयोजन हे आहे कीं, त्यांनी आमचे नाव घ्यावे. म्हणजे बिस्मिल्लाहे व अल्लाहू अकबर म्हणून जबाह करावे. किंवा आमची आठवण ठेवावी.

४) 'बुदनुन' 'बदनतून' चे अनेक वचन आहे. हे जनावर सर्व साधारण मोठे आणि टवटवीत असते. म्हणून बदनता म्हणविले जाते, गुबगुबीत जनावर, शब्द कोशवाल्यांनी याला फक्त उंटाशीच खास केले आहे. परंतु हदीशीच्या अनुषंगाने, गायला सुध्दा बुदनतुन म्हणणे बरोबर आहे अर्थ हा आहे. कीं, उंट आणि गाय जी कुरबानीसाठी घेऊन जाण्यांत येईल हे पण 'शआइरिल्लाह' म्हणजे अल्लाह्च्या त्या आदेशातून आहे, जे मुसलमानांकरता खास, आणि त्यांचे चिन्ह आहे.

५) 'सवाफ्फ' - मसफुफा (रांगा लाऊन म्हणजे उभे होऊन) च्या अर्थांत आहे. उंटाला असेच उभ्या उभ्या जबाह (नहर) केले जाते. डावा हात पाय याचा बांधलेला, आणि तीन पायांवर तो उभा असतो.

१) म्हणजे सर्व रक्त निघून जाईन, आणि ते निष्प्राण होऊन, जमिनीवर पडतील. मग त्यांना कापावयास सुरवात करा. कारण कीं जिवंत जनावरांचे मांस कापून खाणे मना आहे. ''ज्या जनावरांतून या स्थितीत मांस कापले जाईल कीं, ते जिवंत असावे, तर ते कापलेले मांस मुर्दाड आहे.'' (अबु दाऊद इब्ने माजा)

२) काही धर्म पंडिताजवळ, हे काम वाजीब आहे, म्हणजे कुरबानीचे मांस खाणे, कुरबानी करणाऱ्यासाठीं, वाजीब म्हणजे आवश्यक आहे. आणि बहुतेक धर्म पंडिताजवळ हे काम आवडते किंवा खाण्यापुरते, म्हणजे या कामाचा उद्देश्य फक्त नाम मात्र खाणे किंवा नावापुरते खाणे आहे. म्हणजे जर खाऊन घेतले जाईल तर योग्य किंवा चांगले आहे. परंतु जर कोणी खाणार नाही, किंबहुना सर्वच्या सर्व वाटून टाकेन, तर काही गुनाह् नाहीं.

३) 'कानेअ' एक अर्थ, मागणी करणारा, आणि दुसरा अर्थ समाधान मानणारा असा केला गेला आहे. म्हणजे त्याने मागणी करूनये. आणि मुअत्तर चा अर्थ काहींनी, मागणी केल्यांशिवाय पुढे आलेले, असा केला आहे. आणि काहींनी कानेअचा अर्थ, मागणी करणारा, आणि मुअत्तरचा अर्थ, जाईर म्हणजे भेट घेणारा असा केला आहे. म्हणून या महावाक्याचा आधार घेत, म्हटले जातें, कुरबानीच्या मांसाचे तीन वाटे केले जावेत; एक आपल्यासाठीं, दुसरा भेटणाऱ्यांसाठीं, आणि नातेवाईकांसाठी, आणि तिसरा मागणारे आणि समाजातील गरजु व्यक्तींसाठी ज्याच्या समर्थनार्थ ही हदीस पण पुढें केली जाते. जिच्यांत रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, '' मी तुम्हांस (पूर्वी) तीन दिवसापेक्षा जास्त, कुरबानीच्या मांसाचा साठा करून ठेवण्यास मना केले होते; परंतु आता तुम्हांस परवानगी आहे. कीं, खा, आणि जे योग्य वाटेल ते साठा करून ठेवा.'' दुसऱ्या रिवायतीचे शब्द आहेत, ''बस खा! सांठा करा आणि दान करा!'' एका आणखी रिवायतीचे शब्द आहेत, ''बस खा! खाऊ घाला!! आणि दान करा.'' (अल्बुखारी स.मुस्लीम) काही धर्मपंडित दोन वाटे करण्याला मान्याता देतात. अर्धा आपल्यासाठी आणि अर्धा दान करण्यासाठीं. ते याच्यापूर्वी येऊन चुकलेले महावाक्य, ''फकुलु मिनहा व अत्अिमु ल बाईसल फकीर'' ने आधार घेतात. परंतु वास्तवतेत, कुठलेपण महावाक्य, किंवा हदीसने, दोन किंवा तीन वाट्यांत, वाटणी करण्याचा हुकूम निघत नाहीं. किंबहुना यांच्यात फक्त खाणे, खाऊ घालणे चा आदेश आहे. म्हणून या हुकमाला जारी करणे, आपल्या जागी कायम ठेवले पाहिजे; आणि कोण्या वाटणीचे आपल्यावर बंधन घालून घ्यावयास नको. तथापि कुरबानीच्या चामड्यांबाबत एकमत आहे कीं, एक तर त्यांना आपल्या उपयोगांत आणा, किंवा दान करा. त्यांना विकण्याची परवानगी नाहीं, जसे की हदीस मध्ये आहे, (मुसनद अहमद १५/४) तथापि काही धर्मपंडितानी चामडी स्वत: विकून, त्याची किंमत, गरीबांना वाटण्याची परवानगी दिली आहे. (इब्ने कसीर)

**एक आवश्यक खुलासा :-** कुरआन करीम मध्यें, येथे कुरबानीचा उल्लेख हज्जच्या समस्यांच्या संदर्भात आला आहे. ज्याच्याने, हदीशीला नाकारणारे हा आधार घेतात कीं कुरबानी फक्त हाजींसाठीच आहे. दुसऱ्या मुसलमानांसाठी ती आवश्यक नाही. ही गोष्ट बरोबर नाहीं. कुरबानी करण्याचा स्पष्ट हुकूमपण दुसऱ्या जागी आढळून येतो. ''आपल्या पालकर्त्यासाठी नमाज पढ आणि कुरबानी कर'' (सू.अल्कौसर) याची अंमल बजावणी नबी ﷺ नी, अशा प्रकारे केली कीं, आपण स्वत: मदीनेमध्ये प्रत्येक वर्षी, १० जिल्हज्जाला कुरबानी करीत राहिले. आणि मुसलमानांना पण कुरबानी करण्याची ताकीद करीत राहिले. म्हणून सहाबा ﵃ पण करीत राहिले. याशिवाय आपण ﷺ नी कुरबानीच्या बाबतीत जेथे पुष्कळशा सूचना दिल्यात, तेथे हे पण सांगितले कीं, १० जिल्हज्जाला सर्वांत प्रथम (ईदीची) नमाज पढावी, आणि याच्यानंतर जनावर जबाह करावे. फर्माविले, ज्याने ईदच्या नमाजीच्या पूर्वी आपली कुरबानी करून घेतली, त्याने मांस खाण्यांत घाई केली. त्याची कुरबानी झाली नाही. (स.बुखारी स.मुस्लिम) याने पण स्पष्ट आहे. कीं, कुरबानीचा हुकूम प्रत्येक मुसलमानासाठी आहे, तो जेथे कोठे असेल. कारण की, हाजी तर ईद-उल-अजहाची नमाजच पढत नाहीत; ज्याने स्पष्ट जाहीर होते कीं, हा हुकूम जे हाजी नाहीत् त्यांच्या साठीच आहे. तथापि हे वाजिब, नाही. सुन्नते मौअक्कदा आहे.

إِنَّ اللَّهَ يُدَافِعُ عَنِ الَّذِينَ آمَنُوا ۗ إِنَّ اللَّهَ لَا يُحِبُّ كُلَّ خَوَّانٍ كَفُورٍ ﴿٣٨﴾

(ऐकून ठेवा!) खचित्च खऱ्या ईमानवाल्यांच्या शत्रुंना, स्वत: अल्लाह्तआला हटवून देत असतो.[१] कोणी विश्वासघातकी आणि कृतघ्न, अल्लाह्आलाला मुळीच पसंद नाही.(३८)

أُذِنَ لِلَّذِينَ يُقَاتَلُونَ بِأَنَّهُمْ ظُلِمُوا ۚ وَإِنَّ اللَّهَ عَلَىٰ نَصْرِهِمْ لَقَدِيرٌ ﴿٣٩﴾

ज्यां( मुसलमानां)शी (काफिर) युध्द करीत आहेत, त्यांना पण सामना करण्याची परवानगी दिली जात आहे. यासाठी कीं त्यांच्यावर जूलुम होत आहे.[२] आणि काही संशय नाही कीं, त्यांच्या मदतीला अल्लाह् समर्थ आहे.(३९)

الَّذِينَ أُخْرِجُوا مِن دِيَارِهِم بِغَيْرِ حَقٍّ إِلَّا أَن يَقُولُوا رَبُّنَا اللَّهُ ۗ وَلَوْلَا دَفْعُ اللَّهِ النَّاسَ بَعْضَهُم بِبَعْضٍ لَّهُدِّمَتْ صَوَامِعُ وَبِيَعٌ وَصَلَوَاتٌ وَمَسَاجِدُ يُذْكَرُ فِيهَا اسْمُ اللَّهِ كَثِيرًا ۗ وَلَيَنصُرَنَّ اللَّهُ مَن يَنصُرُهُ ۗ إِنَّ اللَّهَ لَقَوِيٌّ عَزِيزٌ ﴿٤٠﴾

हे ते आहेत, ज्यांना कारण नसतांना, आपल्या घरांतून काढले गेले; फक्त त्यांच्या या म्हणण्यांवर, कीं आमचा पालनकर्ता फक्त अल्लाह् आहे.जर अल्लाह्तआला लोकांना आपसात एक दुसऱ्यापासून, हटवीत राहिला नसता, तर उपासनागृहे, आणि चर्च, आणि मशीदी, आणि यहुद्यांची भजनालये, आणि त्या मशीदीसुध्दा ओसाड करून टाकल्या गेल्या असत्या जेथे अल्लाह्चे अतोनात नामस्मरण केले जाते. जो अल्लाह्ची मदत करेल, अल्लाह्पण अवश्य त्याची मदत करेल. नि:संशय अल्लाह्तआला मोठा बलवान, मोठा परम समर्थ आहे.(४०)

الَّذِينَ إِن مَّكَّنَّاهُمْ فِي الْأَرْضِ أَقَامُوا الصَّلَاةَ وَآتَوُا الزَّكَاةَ وَأَمَرُوا بِالْمَعْرُوفِ وَنَهَوْا عَنِ الْمُنكَرِ ۗ وَلِلَّهِ عَاقِبَةُ الْأُمُورِ ﴿٤١﴾

हे ते लोक आहेत, जर आम्ही जमिनीत यांचे पाय जमवून टाकूं, तर हे नियमित नमाज पढतील आणि जकात देतील; आणि चांगल्या कामांचा हुकूम करतील, आणि वाईट कामांपासून मना करतील;[३] सर्व कामांचा परिणाम अल्लाह्च्या अधिकारांत आहे.[४](४१)

१) ज्याप्रमाणे ६, हिजरीमध्ये काफिरांनी आपल्या वर्चस्वाने, मुसलमानांना मक्केला जाऊन उमरा करू दिला नाहीं, अल्लाह्तआलाने दोन वर्षानंतरच, काफिरांच्या या वर्चस्वाला संपवून मुसलमानांवरून त्यांच्या शत्रुला हटवून टाकले. आणि मुसलमानांना त्यांच्यावर प्रबळ करून दिले.

२) बहुतेक पूर्वीच्या ज्ञानी लोकांचे म्हणणे आहे कीं, या महावाक्यांत सर्वप्रथम जिहादचा हुकूम देण्यात आला आहे. ज्याचे दोन उद्देश्य येथे सांगण्यात आले आहेत. अन्यायाला संपविणे, आणि अल्लाह्च्या कलम्याला बुलंद करणे. म्हणून ज्यांच्यावर अन्याय झाला आहे, त्यांची मदत आणि भरपाई न केली जाईल तर, जगांत बलवान, दुर्बलांना, आणि वशिल्यावाले ज्यांचा वशीला नाही, अशा लोकांना जगुंच देणार नाहीं; ज्याने भूमी फसादने भरून जाईल. अशाचप्रकारे अल्लाह्च्या कलम्याला बुलंद करण्याचा जर प्रयत्न केला जाणार नाही, आणि असत्याचे मस्तक ठेचून न टाकले जाईल, तर असत्याच्या प्रबळतेने सुध्दां, जगाची सुख शांती आणि अल्लाह्चे नाव घेण्यासाठी कोणी उपासनागृह, शिल्लक राहणार नाहीं (आणखी खुलाशासाठी पहावे, सू. बकर: आ. २५१ चा समास)

३) या महावाक्यात इस्लामी राज्याचे आधारभूत, आवश्यकता आणि उद्देश्य, सांगण्यात आले आहेत. ज्यांना चार खलीफांच्या काळांत, आणि पहिल्या काळातील, दुसऱ्या इस्लामी सत्तांनी अमलांत आणले. (कार्यान्वयीत केले.) आणि आपल्या प्राधान्याने करावयाच्या कामांत, त्यांना अग्रभागी ठेवले. यामुळे त्यांच्या राज्यात सुख शांती पण नांदली. उच्च दर्जा आणि सुबत्ता पण राहिली. आणि मुसलमान प्रतिष्ठित आणि प्रिय पण राहिलेत. आजपण सौदी अरबच्या सत्तेत. या गोष्टीची काही व्यवस्था आहे. म्हणून याच्या बरकतीने, ते आतांसुध्दा शांती आणि सुबत्तेच्या अनुषंगाने जगातील उत्कृष्ट आणि उदाहरण देण्यासारखे राज्य आहे. आज काल इस्लामी देशांमध्ये, सुधारणावादी राज्याला स्थापन करण्याला प्राधान्य आणि गाजावाजा आहे. आणि प्रत्येक येणारा जाणारा सत्ताधीश याचे दावे करितो. परंतु प्रत्येक इस्लामी देशांत अशांती, फिसाद, खून आणि मारामाऱ्या, आणि दारिद्र्य आणि ऱ्हास, जोरावर आहेत. याचे कारण हे आहे कीं, अल्लाह्ने दाखविलेले रस्ते अंगिकारण्याशिवाय, सर्व पाश्चिमात्त्य लोकशाही आणि धर्म निरपेक्ष व्यवस्थेच्या मार्फत, यश आणि सफलता, मिळवू इच्छितात. जे आकाशाला ठिगळ लावण्यासारखे, आणि हवेला मुठीत बंद करण्यासारखे आहे. जोपर्यंत मुसलमान देश, कुरआनाने दाखविलेल्या तत्त्वानुसार, नमाजीला कायम करणे आणि जकात देण्याला, आणि भलाईचा हुकूम देणे आणि वाईट कामांना मना करणे, याची व्यवस्था करणार नाहीत आणि आपल्या करावयाच्या कामांत त्यांना प्राधान्य देणार नाहीत, ते यशस्वी राज्याच्या स्थापनेत कधीही यशस्वी होणार नाहीत.

४) म्हणजे प्रत्येक गोष्टीचे केंद्र अल्लाहचे आदेश आणि त्याची युक्ती आहे. त्याच्या हुकमाशिवाय ब्रम्हांडांत एक पान पण हलत नाहीं, मग कोणी, अल्लाह्चे आदेश आणि नियमांना टाळून, खरे यश आणि सफलता कशी प्राप्त करू शकतो?

وَاِنْ يُّكَذِّبُوْكَ فَقَدْ كَذَّبَتْ قَبْلَهُمْ قَوْمُ نُوْحٍ وَّعَادٌ وَّثَمُوْدُ ﴿٤٢﴾

**आणि जर हे लोक आपणास खोटे ठरवतील, तर यांच्यापूर्वी नूहचे लोक, आणि आद आणि समूद (४२)**

وَقَوْمُ اِبْرٰهِيْمَ وَقَوْمُ لُوْطٍ ﴿٤٣﴾

**आणि इब्राहीमचे लोक, आणि लूतचे लोक, (४३)**

وَّاَصْحٰبُ مَدْيَنَ ۚ وَكُذِّبَ مُوْسٰى فَاَمْلَيْتُ لِلْكٰفِرِيْنَ ثُمَّ اَخَذْتُهُمْ ۚ فَكَيْفَ كَانَ نَكِيْرِ ﴿٤٤﴾

**आणि मदयनवाले पण, आपआपल्या पैगंबरांना खोटे ठरवून चुकले आहेत. मूसाला पण खोटे ठरवून चुकले आहेत. मग मी काफिरांना अशीच थोडीशी सवलत दिली; मग त्यांना शिक्षेत पकडले,[1] तर माझा कोप कसा राहिला?[2] (४४)**

فَكَاَيِّنْ مِّنْ قَرْيَةٍ اَهْلَكْنٰهَا وَهِيَ ظَالِمَةٌ فَهِيَ خَاوِيَةٌ عَلٰى عُرُوْشِهَا وَبِئْرٍ مُّعَطَّلَةٍ وَّقَصْرٍ مَّشِيْدٍ ﴿٤٥﴾

**पुष्कळशा वस्त्या आहेत, ज्यांचा आम्ही नाश करून टाकला; यासाठी कीं ते अन्यायी होते. तर आता त्या आपल्या छतावर कोसळून पडल्या आहेत. आणि कित्येक विहिरी निकाम्या पडलेल्या आहेत आणि कित्येक पक्क्या पक्क्या आणि उंच हवेल्या ओसाड पडलेल्या आहेत. (४५)**

اَفَلَمْ يَسِيْرُوْا فِى الْاَرْضِ فَتَكُوْنَ لَهُمْ قُلُوْبٌ يَّعْقِلُوْنَ بِهَآ اَوْ اٰذَانٌ يَّسْمَعُوْنَ بِهَا ۚ فَاِنَّهَا لَا تَعْمَى الْاَبْصَارُ وَلٰكِنْ تَعْمَى الْقُلُوْبُ الَّتِىْ فِى الصُّدُوْرِ ﴿٤٦﴾

**तर काय हे लोक मुलुखांत हिंडले फिरले नाहींत? जी यांची अंत:करणे, या गोष्टींना समजणारी असती, किंवा कानांनीच या घटनांना ऐकून घेते, गोष्ट ही आहे कीं फक्त डोळेच आंधळे होऊन जात नाहीत, परंतु ती मने आंधळी होतात जी छातीत आहेत.[3] (४६)**

وَيَسْتَعْجِلُوْنَكَ بِالْعَذَابِ وَلَنْ يُّخْلِفَ اللّٰهُ وَعْدَهٗ ۗ وَاِنَّ يَوْمًا عِنْدَ رَبِّكَ كَاَلْفِ سَنَةٍ مِّمَّا تَعُدُّوْنَ ﴿٤٧﴾

**आणि हे शिक्षेसाठी तुमच्याकडे घाई मचवीत आहेत; अल्लाह् कधीच आपला वायदा टाळणार नाही; होय परंतु तुमच्या पालनकर्त्या जवळ, एक दिवस तुमच्या गणतीनुसार एक हजार वर्षांचा आहे.[4] (४७)**

१) याच्यांत नबी ﷺ ची सांत्वना करण्यात येत आहे की, जर हे मक्केचे काफिर आपल्याला खोटे ठरवत आहेत, तर ही काही नवी गोष्ट नाही. मागील लोक पण आपल्या पैगंबराबरोबर असेच काही करत आलेले आहेत. आणि मी पण त्यांना अवकाश देत राहिलो. मग जेव्हा यांच्या अवकाशाची मुद्दत संपून गेली, तेव्हा त्यांना तबाह आणि बर्बाद करून टाकण्यात आले. याच्यांत मक्केच्या मुशरिकांना चेतावणी आणि इशारा आहे कीं, खोटे ठरविल्यानंतर सुध्दा, तुम्ही आतापर्यंत अल्लाह्च्या पकडीपासून वाचून राहिलेले आहात; तर असे समजू नका कीं, आम्हांस कोणी जाब घेणारा नाहीं; किंबहुना हा अल्लाहकडून अवकाश आहे, जो तो प्रत्येक समाजाला देत असतो. पण जर तो या सवलती पासून फायदा उचलून आज्ञापालन आणि अधिन होण्याचा, मार्ग अंगिकारत नाही, तर मग त्यांचा नाश किंवा मुसलमानांच्या हातांनी पराजीत होणे आणि अप्रतिष्ठा आणि फटफजिती चा सामना करावा लागतो.

२) म्हणजे कशा प्रकारे मी त्यांना आपल्या देणग्यांकडून वंचित् करून, शिक्षा आणि नाश करून टाकला.

३) आणि जेव्हांकोणी समाज मार्गभ्रष्टतेच्या त्या स्थिती पोहचून जातो, कीं बोध घेण्याचे सामर्थ्य पण घालवून बसतो, तेव्हा हिदायतच्या ऐवजी, मागील लोकांप्रमाणे, नष्ट होणेच त्यांच्या नशीबी येते. महावाक्यात विचार करण्याच्या कृतिचा संबंध अंत:करणाकडे केला गेला आहे. ज्याने आधार घेतला गेला आहे, की बुध्दीचे घर, अंत:करण आहे. आणि काही म्हणतात कीं, बुध्दीचे घर मेंदू आहे. काही म्हणतात की, या दोन्ही गोष्टींत काही तथ्य नाहीं, कारण कीं समज आणि जाणीव प्राप्त करण्यामध्ये, मन आणि मेंदू दोघांचा आपसात गहिरा संबंध आहे. (फत्हुल कदीर, अयसरत तफासीर)

४) यासाठी हे लोक आपल्या हिशेबांत घाई करतात. परंतु अल्लाहूतआलाच्या हिशेबात एक दिवस पण एक हजार वर्षाचा आहे. या अनुषंगाने तो जर कोणाला एक दिवस (२४ तास) सवलत देईल तर हजार साल, अर्ध्या दिवसाची सवलत देईल तर पांचशे वर्षे , ६ तास (जे २४ तासाचे एक चर्तुथांश आहे) सवलत देईल तर, अडीचशे वर्षांचा काळ, शिक्षा पाठविण्यासाठी लागणार आहे. व हलुम्मा जर्रा, अशा प्रकारे अल्लाहकडून कोणाला' तासाची सवलत मिळेल तर कमी जास्त ४० वर्षांची सवलत आहे. (अयसरत तफासीर) एक दुसरा अर्थ हा आहे कीं, अल्लाह्च्या सामर्थ्यात, एक दिवस आणि हजार वर्षे, समान आहेत. म्हणून घाई करून किंवा उशीर करून काही फरक पडत नाहीं. हे घाई करतात, तो उशीर करतो. तथापि ही गोष्ट नक्की आहे कीं, तो आपले वचन जरूर पूर्ण करून राहील. आणि काहींनी त्याला परलोकावर धरले आहे; की भयानक धास्तीमुळे, कयामतचा एक दिवस एक हजार आणि काहींना ५० हजार वर्षांचा वाटेल आणि काहींनी म्हटले कीं, परलोकातील एक दिवस खरोखर एक हजार वर्षांचा असेल.

وَكَاَيِّنْ مِّنْ قَرْيَةٍ اَمْلَيْتُ لَهَا وَهِيَ ظَالِمَةٌ ثُمَّ اَخَذْتُهَا ۚ وَاِلَيَّ الْمَصِيْرُ ﴿٤٨﴾

आणि पुष्कळशा जुलूम करणाऱ्या वस्त्यांना मी ढील दिली. मग शेवटी त्यांना पकडून घेतले;माझ्यांच कडे परतून येणे आहे.[१] (४८)

قُلْ يٰۤاَيُّهَا النَّاسُ اِنَّمَاۤ اَنَا لَكُمْ نَذِيْرٌ مُّبِيْنٌ ﴿٤٩﴾

(आपण) सांगून टाका की अहो लोकांनो! मी तुम्हास उघड उघड सावध करणाराच आहे.[२] (४९)

فَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَهُمْ مَّغْفِرَةٌ وَّرِزْقٌ كَرِيْمٌ ﴿٥٠﴾

मग ज्यांनी ईमान आणले आहे; आणि ज्यांनी चांगले कामे केली आहेत,त्यांच्यासाठी क्षमा आहे,आणि सन्मानाची उपजिविका (आहे.) (५०)

وَالَّذِيْنَ سَعَوْا فِيْۤ اٰيٰتِنَا مُعٰجِزِيْنَ اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ الْجَحِيْمِ ﴿٥١﴾

आणि जे लोक आमच्या निशाण्यांना दाबून टाकण्यासाठी झटतात;[३] तेच नर्काग्नीत जाणारे आहेत. (५१)

وَمَاۤ اَرْسَلْنَا مِنْ قَبْلِكَ مِنْ رَّسُوْلٍ وَّلَا نَبِيٍّ اِلَّاۤ اِذَا تَمَنّٰۤى اَلْقَى الشَّيْطٰنُ فِيْۤ اُمْنِيَّتِهٖ ۚ فَيَنْسَخُ اللّٰهُ مَا يُلْقِى الشَّيْطٰنُ ثُمَّ يُحْكِمُ اللّٰهُ اٰيٰتِهٖ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌ حَكِيْمٌ ﴿٥٢﴾

आणि आम्ही आपल्या पूर्वी ज्या प्रेषित आणि प्रवक्त्याला (रसूल आणि नबी) पाठविले,त्याच्या बरोबर असे झाले की,जेव्हा तो आपल्या मनांत कोणी आकांक्षा करू लागला,शैतानाने त्या आंकाक्षेत काही मिळवून दिले.मग शैतानांच्या मिळावटीला अल्लाहतआला दूर करून देतो, मग आपल्या गोष्टी पक्क्या करून टाकतो.[४] अल्लाहतआला ज्ञाता आणि जो बुध्दीवान आहे. (५२)

لِّيَجْعَلَ مَا يُلْقِى الشَّيْطٰنُ فِتْنَةً لِّلَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ وَّالْقَاسِيَةِ قُلُوْبُهُمْ ؕ وَاِنَّ الظّٰلِمِيْنَ لَفِيْ شِقَاقٍۭ بَعِيْدٍ ﴿٥٣﴾

हे यासाठी की,शैतानी मिळावटीला,अल्लाहतआलाने त्या लोकांच्या कसोटीचे साधन बनवून घ्यावे, ज्यांच्या मनात रोग आहे. आणि ज्यांची अंत:करणे कठोर आहेत;[५] नि:संशय गुन्हेगार लोक पराकाष्टेच्या विरोधात पडलेले आहेत. (५३)

وَّلِيَعْلَمَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْعِلْمَ اَنَّهُ الْحَقُّ مِنْ رَّبِّكَ فَيُؤْمِنُوْا بِهٖ فَتُخْبِتَ لَهٗ قُلُوْبُهُمْ ؕ وَاِنَّ اللّٰهَ لَهَادِ الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اِلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ﴿٥٤﴾

आणि यासाठी पण की ज्यांना ज्ञान दिले गेले आहे, त्यांनी जाणून घ्यावे की,तुमच्या पालनकर्त्या कडूनच निव्वळ सत्यच आहे,त्यांनी त्याच्यावर ईनाम आणावे आणि त्यांची अंत:करणे त्यांच्याकडे नम्र होऊन झुकावीत;[६] खचितच अल्लाहतआला,ईनामवाल्यांना सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करणाराच आहे.[७] (५४)

وَلَا يَزَالُ الَّذِيْنَ كَفَرُوْا فِيْ مِرْيَةٍ مِّنْهُ حَتّٰى تَاْتِيَهُمُ السَّاعَةُ بَغْتَةً اَوْ يَاْتِيَهُمْ عَذَابُ يَوْمٍ عَقِيْمٍ ﴿٥٥﴾

आणि काफिर, अल्लाह्च्या या वह्यात नेहमी शंका कुशंका काढतच राहणार आहेत. येथ पावेतो की त्यांच्या शिरावर अचानक कयामत येऊन लागेल. किंवा त्यांच्याजवळ त्या दिवसाची शिक्षा येऊन पोहचेल, जो भलाईने रिक्त असेल.[८] (५५)

اَلْمُلْكُ يَوْمَئِذٍ لِّلّٰهِ ؕ يَحْكُمُ بَيْنَهُمْ ؕ فَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ فِيْ جَنّٰتِ النَّعِيْمِ ﴿٥٦﴾

त्यादिवशी फक्त अल्लाहचेच राज्य असेल,[९] तोच यांच्यात निर्णय करेन. ईमान आणि चांगल्या कामावाले तर देणग्यांनी भरपूर अशा स्वर्गात असतील. (५६)

وَالَّذِيْنَ كَفَرُوْا وَكَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا فَاُولٰٓئِكَ لَهُمْ عَذَابٌ مُّهِيْنٌ ﴿٥٧﴾

आणि ज्या लोकांनी कुफ्र केले, आणि आमच्या निशाण्यांना मानले नाही, त्यांच्या करिता अपमानजनक शिक्षा आहे. (५७)

१) याच्याचसाठी येथे सवलतीच्या नियमाला पुन्हा सांगण्यात आले आहे की,माझ्याकडून शिक्षेत कितीही उशीर का होऊन जाऊ नये; तथापि माझ्या पकडीपासून कोणी वाचू शकत नाही; न कोठे पळून जाऊ शकतो.त्याला परतून सरशेवटी माझ्याचकडे येणे आहे.

२) हे काफिर आणि मुशरिक लोकांच्या शिक्षेच्या मागणीवर सांगितले जात आहे की, माझे काम, भिवविणे आणि खुषखबरी देणे आहे.शिक्षा पाठविणे हे अल्लाहचे काम आहे. तो लवकर पकड करून घेईल,किंवा तिच्यात उशिर करेन;आणि तो आपली मर्जी आणि प्रयोजनानुसार हे काम करतो.ज्यांचे ज्ञान अल्लाहच्याशिवाय कोणाला नाही.या संबोधनाचे मूळ संबोधित जरी मक्केवाले आहेत,परंतु कारण की आपण (सल्ल.) पूर्ण माणव जातीसाठी मार्गदर्शक आणि

पैगंबर बनून आले होते, म्हणून संबोधन 'या अय्युहन्नास' (हे लोकांनो) च्या शब्दांनी केले गेले आहे. यांच्यात कयामत पर्यंत, होणारे ते काफिर आणि मुशरिक येऊन गेले,जे मक्कावाल्या कफिरासारखी चाल अनुसरतील.

३)'मुआजिजीन' चा अर्थ आहे,असे गुमान करत,की ते आम्हाला भाग पाडतील, थकवून टाकतील,आणि आम्ही त्यांची पकड करणाऱ्याला समर्थ होऊ शकणार नाही.यासाठी की ते, मेल्यानंतर पुन्हा जिवंत होऊन उठणे, आणि लेखा जोखा होण्याला नाकारत होते.

४) तमन्नाचा एक अर्थ आहे, अपेक्षा केली, किंवा मनांत विचार केला. दुसरा अर्थ आहे, वांचले, किंवा वाचन केले. या अनुषंगाने' उमनियतांचे भाषांतर अपेक्षा, विचार किंवा वाचन, होईल. पहिल्या अर्थाच्या अनुषंगाने, भावार्थ होईल, त्याच्या आकांक्षेमध्यें शैतानाने अडथळे आणले, कारण की, पूर्ण न व्हावी. आणि प्रेषित आणि प्रवक्त्याची हीच अपेक्षा असते, की लोकांनी जास्तीत जास्त ईमान आणावे. शैतान अडथळे करुन, लोकांना जास्तीत जास्त, ईमानापासून दूर ठेवू इच्छितो. दुसऱ्या अर्थानुसार, भावार्थ होईल की, जेव्हा कधी अल्लाहचा प्रेषित किंवा प्रवक्ता, अवतरीत झालेली वाणी वाचतो, आणि तिचे पठण करतो, तेव्हा शैतान त्याच्या वाचनांत, पठनात, आपल्या गोष्टी मिळविण्याचा प्रयत्न करतो; किंवा याच्या बाबतीत लोकांच्या मनांत, शंका टाकतो; आणि त्याच्यांत नानाप्रकारच्या शंका कुशंका काढतो. अल्लाहतआला शैतानाच्या अडथळ्याला दूर करुन, किंवा पठनामध्ये मिलावटच्या प्रयत्नांना असफल करुन, किंवा शैतानाच्या निर्माण केलेल्या शंका कुशंकांचे निर्सन करुन, आपल्या गोष्टीला, किंवा आपल्या महावाक्याला भक्कम करुन देतो. याच्यात नबी सल्लल्लाहु अलैहिव सल्लमची सांत्वना करण्यात येत आहे की, शैतानाची ही कारस्थाने, फक्त आपल्याशीच नाहीत; आपल्या पूर्वी जे प्रेषित आणि प्रवक्ते आलेत, सर्वांबरोबर हेच काही करत आला आहे. तथापि आपण घाबरु नये, शैतानाच्या या खोडसाळपणाने आणि कारस्थानांनी, ज्याप्रमाणे आम्ही मागील पैगंबरांना वाचवून घेत राहिलो आहोत, खचित्च आपण पण सुरक्षित रहाल आणि अल्लाहतआला, आपल्या गोष्टीला भक्कम करुन राहील.

५) म्हणजे शैतान हे प्रयत्न यासाठी करतो की, लोकांना बहकवावे; आणि त्याच्या जाळ्यांत ते लोक फसून जातात, ज्यांच्या मनात कुफ्र आणि कपटाचा रोग असतो. किंवा पापार्जन करुन त्यांची मने कठोर झालेली असतात.

६) म्हणजे हे शैतानी वसवसे, जे मुळात शैतानाचे उचकावून घेणे आहे, जर कपटी आणि शंकेखोर, आणि कुफ्र आणि शिर्कवाल्यांच्या बाबतीत फितन्याला कारणीभूत आहेत, तर दुसऱ्या बाजूला जेथे ज्ञान आणि अल्लाहची ओळख आहे, अशांच्या ईमान आणि भरोशात वाढ होते, आणि ते समजून जातात की, अल्लाहची अवतरीत केलेली गोष्ट, म्हणजे कुरआन सत्य आहे, ज्यामुळे त्यांची अंत:करणे, अल्लाहच्या समक्ष झुकून जातात.

७) इहलोकांत सुध्दा आणि परलोकांत सुध्दा. इहलोकांत अशा प्रकारे की, त्यांचे मार्गदर्शन सत्याकडे करुन देतो. आणि त्याला मान्य करण्याची आणि त्याचे अनुपालन करण्याची सुबुध्दी पण देतो. निरर्थक गोष्टींची समज पण त्यांना देतो. आणि त्यापासून त्यांना वाचवून घेतो. आणि परलोकांत सरळमार्गाचे मार्गदर्शन हे आहे की, त्यांना नरकाग्नीच्या मोठ्या आणि कडक शिक्षेपासून वाचवून, स्वर्गात दाखल करीन. आणि तेथे त्यांना आपल्या देणग्या आणि दर्शनाने उपकृत करेल.

८) यौमून अकीम (वांझ दिवस) ने पण अभिप्रेत कयामतचा दिवस आहे. त्याला वांझ यासाठी म्हणण्यात आले आहे की, याच्यानंतर कोणी दिवस असणार नाही. ज्याप्रमाणे अकीम त्याला म्हटले जाते, ज्याला संतती नसते. किंवा यासाठी की, काफिरांसाठी त्या दिवशी काही दया (माया) असणार नाही. जणू त्यांच्यासाठी भलाईने रिक्त असेल. ज्याप्रमाणे चक्रीवादळाला, जे शिक्षा म्हणून येत असते, अर्र रिहुल् अकीम म्हणण्यात आले आहे. ''जेव्हा आम्ही त्यांच्यावर वांझ हवा पाठवली.'' (सू.जारियात- ४१) म्हणजे अशी हवा जिच्यात काही भलाई नव्हती, तसेच पावसाची खुषखबर पण नव्हती.

९) म्हणजे जगात तर तात्पुरत्या स्वरुपात, इनाम म्हणून किंवा परीक्षा म्हणून, लोकांना पण राज्ये, अधिकार आणि सत्ता मिळून जाते. परंतु परलोकांत कोणापाशी सुध्दा, कोणी राज्य, अधिकार असणार नाही. फक्त एका अल्लाहचीच बादशाही आणि त्याच्याच आज्ञांचे पालन होईल. त्याचाच संपूर्ण अधिकार आणि वर्चस्व राहील. ''रहमानसाठी, बादशाही त्या दिवशी, सिध्द आहे; आणि हा दिवस काफिरांसाठी फारच जड जाईल.'' (सू.फुरकान- २६) अल्लाहतआला विचारील, ''आज कोणाचे राज्य आहे?'' मग स्वत:च उत्तर देईल, ''एका प्रबळ अल्लाहचे.'' (सू. मोमिन-१६)

वَالَّذِيْنَ هَاجَرُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ثُمَّ قُتِلُوْٓا اَوْ مَاتُوْا لَيَرْزُقَنَّهُمُ اللّٰهُ رِزْقًا حَسَنًا ؕ وَاِنَّ اللّٰهَ لَهُوَ خَيْرُ الرّٰزِقِيْنَ ﴿۵۸﴾

**आणि ज्या लोकांनी अल्लाहच्या मार्गात, स्वदेश त्याग केला, मग ते मारले गेलेत, किंवा आपल्या मृत्यूने मरण पावलेत;[१] अल्लाहतआला त्यांना उत्कृष्ट अन्नसंपत्ती देईल.[२] आणि नि:संशय अल्लाहतआला, अलबत सर्वांहून उत्कृष्ट अन्नदाता आहे.[३] ५८**

لَيُدْخِلَنَّهُمْ مُّدْخَلًا يَّرْضَوْنَهٗ ؕ وَاِنَّ اللّٰهَ لَعَلِيْمٌ حَلِيْمٌ ﴿۵۹﴾

**त्यांना अल्लाहतआला अशा जागी पोहोचवीन, की ते त्याच्याने राजी होऊन जातील.[४] नि:संशय अल्लाहतआला ज्ञाता आणि दर्याद्र[५] आहे. ५९**

ذٰلِكَ ۚ وَمَنْ عَاقَبَ بِمِثْلِ مَا عُوْقِبَ بِهٖ ثُمَّ بُغِيَ عَلَيْهِ لَيَنْصُرَنَّهُ اللّٰهُ ؕ اِنَّ اللّٰهَ لَعَفُوٌّ غَفُوْرٌ ﴿۶۰﴾

**गोष्ट अशीच आहे आणि[६] ज्याने बदला घेतला, त्याच्या बरोबर, जे केले गेले, मग जर त्याच्यावर अत्याचार केला जाईल, तर खचित्च अल्लाह्तआला त्याची मदत करील.[७] नि:संशय अल्लाह्तआला करुणाशिल आणि क्षमाकर्ता आहे.[८] ६०**

ذٰلِكَ بِاَنَّ اللّٰهَ يُوْلِجُ الَّيْلَ فِي النَّهَارِ وَيُوْلِجُ النَّهَارَ فِي الَّيْلِ وَاَنَّ اللّٰهَ سَمِيْعٌۢ بَصِيْرٌ ﴿۶۱﴾

**हे यासाठी की, अल्लाह रात्रीला दिवसात दाखल करीत असतो; आणि दिवसाला रात्रीत दाखल करीत असतो.[९] आणि नि:संशय अल्लाह ऐकणारा (आणि) पाहणारा आहे. ६१**

१) म्हणजे या स्वदेश त्यागाच्या अवस्थेत जर मृत्यु येऊन गेला, किंवा मारले गेले.

२) म्हणजे स्वर्गातील देणग्या संपणार नाहीत आणि नष्टपण होणार नाही.

३) कारण की तो गणतीशिवाय, मागणी केल्याशिवाय तसेच याचना केल्याशिवाय देत असतो. याशिवाय माणसे पण जे एक दुसऱ्याला देत असतात, ते त्याच्या दिलेल्या मधून देत असतात. म्हणून खरा रोजी देणारा तोच आहे.

४) कारण की स्वर्गातील देणग्या अशा असतील, ''ज्यांना न आजपर्यंत कोण्या डोळ्यांनी पाहिले न कोण्या कानांनी ऐकले; आणि पहाणे ऐकणे तर कुठे? कोण्या मनुष्याचे मनात त्याची कल्पनापण आली नाही.'' बरे! अशा देणग्यांना पावून, कोण आनंदित होणार नाही?

५) 'अलीम' तो पुण्यकर्मे करणाऱ्यांच्या दर्जाला, आणि त्याच्या मर्तब्याच्या योग्यतेला जाणतो. 'हलीम' (करुणाशील आहे) कुफ्र आणि शिर्क करणाऱ्यांचा – उध्दटपणा आणि आज्ञाभंगाला तो पहातो. परंतु त्यांची ताबडतोब पकड करीत नाही.

६) म्हणजे हा हिजरत करणाऱ्यांशी, खास हौतात्म्य किंवा स्वाभाविक मृत्यु म्हणून, आम्ही जो वायदा केला आहे, तो जरुर पूर्ण होईल.

७) 'उकुबत' त्या शिक्षा किंवा बदल्याला म्हणतात, जो कोण्या कृत्याचा बदला असावा. अर्थ हा आहे की, कोणी कोणाबरोबर काही अत्याचार केला आहे, तर ज्यावर अत्याचार केला गेला आहे, त्याला अत्याचाराच्या प्रमाणात, बदला घेण्याचा हक्क आहे. (तथापि जर माफ करुन टाकेल, तर जास्त उत्तम आहे.) परंतु जर बदला घेतल्यांनंतर, जेव्हा की अत्याचारी आणि अत्याचार पीडित, दोन्हीही समान होऊन गेले असतील, अत्याचारी, अत्याचार पीडितावर पुन्हा अत्याचार करील, तर अल्लाहतआला या अत्याचार पीडिताची जरुर मदत करतो. म्हणजे ही शंका नसावी, की अत्याचार पीडिताने, माफ करुन देण्याची ऐवजी, बदला घेऊन चूक केली आहे. नाही! किंबहुना याची पण परवानगी अल्लाहनेच दिलेली आहे. म्हणून पुढे सुध्दा, तो अल्लाहच्या मदतीला पात्र राहील.

८) याच्यात पुन्हा क्षमा करुन देण्याला प्रोत्साहन दिले गेले आहे की, अल्लाह् क्षमाकर्ता आहे; तुम्ही पण क्षमेने काम घ्या. एक दुसरा अर्थ हा पण होऊ शकतो की बदला घेण्यात, जो जालीमाच्या जुलुमाप्रमाणे असेल, जेवढा जुलूम केला जाईल, याची परवानगी कारण की, अल्लाहकडून आहे, म्हणून याच्यावर पकड होणार नाही. किंबहुना तो माफ आहे. किंबहुना त्याला जुलूम आणि वाईट, त्याच्याच सारखे म्हणून म्हटले जाते.नाहीतर सूड किंवा बदला, प्रथमपासूनच जुलूम किंवा वाईट नाही.

ذٰلِكَ بِاَنَّ اللّٰهَ هُوَ الْحَقُّ وَ اَنَّ مَا يَدْعُوْنَ مِنْ
دُوْنِهٖ هُوَ الْبَاطِلُ وَاَنَّ اللّٰهَ هُوَ الْعَلِيُّ الْكَبِيْرُ ﴿٦٢﴾

**हे सर्व यासाठी की, अल्लाहच सत्य आहे.[१] आणि त्याच्या शिवाय ज्यांना हे बोलावितात, ते असत्य आहेत आणि नि:संशय अल्लाहच महिमाशाली आणि मोठा आहे. ६२**

اَلَمْ تَرَ اَنَّ اللّٰهَ اَنْزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً ۡ
فَتُصْبِحُ الْاَرْضُ مُخْضَرَّةً ؕ اِنَّ اللّٰهَ لَطِيْفٌ خَبِيْرٌ ﴿٦٣﴾

**काय आपण पाहिले नाही, की अल्लाहतआला आकाशांतून पाणी वर्षवितो. मग जमीन हिरवीगार होऊन जाते. नि:संशय अल्लाहतआला (मोठाच) मेहेरबान आणि जाणता आहे.[२] ६३**

لَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ؕ وَاِنَّ اللّٰهَ
لَهُوَ الْغَنِيُّ الْحَمِيْدُ ﴿٦٤﴾

**आकाश आणि पृथ्वीत जे काही आहे,[३] त्याचेच आहे. आणि खचित्च अल्लाह तोच आहे, निरपेक्ष आणि स्तुत्य ६४**

اَلَمْ تَرَ اَنَّ اللّٰهَ سَخَّرَ لَكُمْ مَّا فِي الْاَرْضِ وَالْفُلْكَ
تَجْرِيْ فِي الْبَحْرِ بِاَمْرِهٖ ؕ وَيُمْسِكُ السَّمَآءَ
اَنْ تَقَعَ عَلَى الْاَرْضِ اِلَّا بِاِذْنِهٖ ؕ اِنَّ اللّٰهَ
بِالنَّاسِ لَرَءُوْفٌ رَّحِيْمٌ ﴿٦٥﴾

**काय आपण पाहिले नाही की, अल्लाहनेच जमिनीच्या सर्व वस्तु तुमच्या ताब्यात करुन दिल्या आहेत.[४] आणि त्याच्या आज्ञेने पाण्यात चालणाऱ्या नावासुध्दा. आणि तोच आकाशाला सावरुन आहे की, जमिनीवर त्याच्या परवानगीशिवाय, त्याने पडून न जावे,[५] नि:संशय अल्लाहतआला, लोकांवर मोठी करुणा आणि नरमी करणारा आणि मेहरबान आहे.[६] ६५**

وَهُوَ الَّذِيْۤ اَحْيَاكُمْ ۡ ثُمَّ يُمِيْتُكُمْ ثُمَّ يُحْيِيْكُمْ ؕ
اِنَّ الْاِنْسَانَ لَكَفُوْرٌ ﴿٦٦﴾

**आणि त्यानेच तुम्हास जिवंत केले, मग तोच तुम्हास मारुन टाकील; मग तोच तुम्हास जिवंत करीन. नि:संशय मनुष्य फारच अनुपकारी आहे.[७] ६६**

१) यासाठी याचा धर्म सत्य आहे. त्याची उपासना सत्य आहे. त्याचे वायदे सत्य आहेत. त्याची आपल्या मित्रांची त्यांच्या शत्रुंच्या मुकाबल्यात मदत करणे, सत्य आहे. तो अल्लाह, सन्मान आणि महानतेवाला, आपल्या वैशिष्टचात, आपल्या व्यक्तीत्वात, आणि आपल्या कामात सत्य आहे.

२) लतीफ म्हणजे सुक्ष्म पहाणारा आहे, त्याचे ज्ञान, सर्व लहान मोठ्या वस्तुंना, व्यापून आहे. किंवा दया करणारा आहे. म्हणजे आपल्या दासांना रोजी पोहचविण्यात दया आणि कृपेने काम घेतो. 'खबीर' तो या गोष्टींना जाणणारा आहे. ज्याच्यात याच्या सेवकांच्या प्रकरणांची युक्ती प्रयुक्ती आणि सुधारणा आहे, किंवा त्यांच्या गरजा आणि इच्छांना जाणणारा आहे.

३) निर्मितीच्या अनुषंगाने पण,स्वामित्वाच्या अनुषंगाने पण,आणि फेरफार करण्याच्या अनुषंगाने पण.याच साठी सर्व सृष्टी त्याच्यावर अवलंबून आहे,तो कोणावर अवलंबून नाही: कारण की तो 'गनी' म्हणजे निरपेक्ष आहे.आणि ज्या व्यक्तीत्वाला ,सर्व प्रकारची परीपूर्णता,आणि सर्व प्रकारचे अधिकार प्राप्त आहे; प्रत्येक स्थितीत स्तुतीला पण पात्र तेच (व्यक्तीत्व) आहे.

४) उदाहरणार्थ जनावरे,पाण्याचे पाट,वृक्ष,आणि दुसऱ्या बेसुमार वस्तू, ज्यांच्या फायद्यांनी मनुष्य लाभान्वयीत आणि त्यांच्या पासून आनंद उचलणारा होता.

५)म्हणजे जर तो इच्छेल, तर आकाश जमिनीवर पडून जाईल.ज्यामुळे जमिनीवर आढळून येणारी प्रत्येक वस्तू नष्ट होऊन जाईल. होय! परंतु कयामतच्या दिवशी, त्यांच्या मर्जीने आकाश सुध्दा,तोडीफोडीला बळी पडून जाईल.

६) म्हणून त्याने चर्चीत वस्तूंना मनुष्याचे अधिन करून दिले आहे.आणि आकाशालाही त्यांच्यावर पडू देत नाही अधिन करण्याचा अर्थ आहे कीं, या सर्व गोष्टीपासून फायदा उचलणे, त्याच्यासाठी शक्य आणि सोपे करून दिले आहे.

७) काही माणसांचे या अनुपकारांतून वगळले जाणे, याच्या विरूध्द नाही. कारण कीं बहुसंख्य माणसांत हे कुफ्र आणि अहंकार आढळून येतो.

لِكُلِّ اُمَّةٍ جَعَلْنَا مَنْسَكًا هُمْ نَاسِكُوْهُ فَلَا يُنَازِعُنَّكَ فِى الْاَمْرِ وَادْعُ اِلٰى رَبِّكَ ؕ اِنَّكَ لَعَلٰى هُدًى مُّسْتَقِيْمٍ ﴿٦٧﴾

**प्रत्येक उम्मतसाठी आम्ही उपासनेची एक पध्दत निश्चित करुन दिली आहे. ज्यांना ते अनुसरतात.[१] त्यांना पाहिजे की, या कामात आपल्याशी झगडा करु नये.[२] आपण आपल्या पालनकर्त्याकडे लोकांना बोलावित रहा. खचितच् तुम्ही सरळ मार्गावर आहात.[३] (६७)**

وَاِنْ جٰدَلُوْكَ فَقُلِ اللّٰهُ اَعْلَمُ بِمَا تَعْمَلُوْنَ ﴿٦٨﴾

**तरी सुध्दा हे लोक जर आपणाशी झगडतील, तर आपण सांगून द्या की, तुमच्या कर्माशी, अल्लाहतआला खूप वाकब आहे. (६८)**

اَللّٰهُ يَحْكُمُ بَيْنَكُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ فِيْمَا كُنْتُمْ فِيْهِ تَخْتَلِفُوْنَ ﴿٦٩﴾

**नि:संशय तुमच्या सर्व मतभेदांचा फैसला, कयामतच्या दिवशी स्वत: अल्लाहतआला करेल.[४] (६९)**

اَلَمْ تَعْلَمْ اَنَّ اللّٰهَ يَعْلَمُ مَا فِى السَّمَآءِ وَالْاَرْضِ ؕ اِنَّ ذٰلِكَ فِىْ كِتٰبٍ ؕ اِنَّ ذٰلِكَ عَلَى اللّٰهِ يَسِيْرٌ ﴿٧٠﴾

**काय आपणांस ठाऊक नाही की, आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तू, अल्लाहच्या ज्ञानांत आहे; हे सर्व पुस्तकांत सुरक्षित आहे. अल्लाहतआलासाठी तर हे काम फारच सोपे आहे.[५] (७०)**

وَيَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ مَا لَمْ يُنَزِّلْ بِهٖ سُلْطٰنًا وَّمَا لَيْسَ لَهُمْ بِهٖ عِلْمٌ ؕ وَمَا لِلظّٰلِمِيْنَ مِنْ نَّصِيْرٍ ﴿٧١﴾

**आणि हे अल्लाहशिवाय त्यांची भक्ती करतात, ज्यांचे काही (अल्लाहकडून) प्रमाण अवतरीत झाले नाही; आणि न ते स्वत: याचे काही ज्ञान बाळगतात.[६] जालिमांचा कोणी मददगार नाहीं. (७१)**

१) म्हणजे प्रत्येक काळांत, आम्ही लोकांसाठी एक धर्म संविधान निश्चित केले. जे काही गोष्टींत एक दुसऱ्याच्या वेगवेळे असे; ज्याप्रमाणे तौरात ह. मूसा عليه السلام च्या लोकांसाठी, इंजील ह. ईसा عليه السلام च्या उम्मतसाठी, धर्म संविधान होते. आणि कुरआन, उम्मते मुहम्मदिया (सल्ल) करिता धर्म संविधान आणि जीवन पध्दती आहे.

२) म्हणजे अल्लाहने आपल्याला जो धर्म आणि संविधान प्रदान केले. हे पण चर्चित तत्त्वाप्रमाणे आहे. यापूर्वींच्या संविधानवाल्या लोकांना पाहिजे कीं, आता आपल्या संविधानावर ईमान घेऊन यावे, आणि या मामल्यांत आपल्याशी भांडू नये.

३) म्हणजे आपण त्यांच्या भांडणाची पर्वा करू नका. किंबहुना त्यांना आपल्या पालनकर्त्याकडे बोलवित रहा. कारण कीं आता सरळ मार्गावर फक्त आपणच चालत आहांत. म्हणजे मागील (सर्व) धर्म संविधान आता रद्द होऊन गेली आहेत.

४) म्हणजे सांगून आणि सर्व तर्क पूर्ण करून दिल्यानंतर, सुध्दा हे झगडण्यापासून परावृत झाले नाही, तर त्यांचा मामला अल्लाहच्या हवाली करून द्या. आणि सांगून द्या कीं, अल्लाहतआलाच तुमच्या मतभेदाचा निवाडा, कयामतच्या दिवशी करेन. मग त्या दिवशी स्पष्ट होऊन जाईन कीं, खरे काय आहे आणि खोटे काय आहे? कारण कीं तो याच्याप्रमाणे सर्वांना बदला देईल.

५) याच्यात अल्लाहतआलाने आपले अत्युच्च ज्ञान आणि सृष्टीच्या व्यापाचे वर्णन केले आहे. म्हणजे याच्या सृष्टीला जे कांही करावयाचे होते, त्याला त्याचे ज्ञान पूर्वींपासूनच होते. ज्या दासांना आपला अखत्यार आणि इराद्याने, पुण्याचा मार्ग, आणि ज्यांना आपल्या अखत्यारीने, वाईटाचा मार्ग अवलंबायचा होता; तो त्याला जाणत होता. म्हणून त्याने आपल्या ज्ञानाने पूर्वींच या गोष्टी लिहून टाकल्या आणि लोकांना ही गोष्ट कितीही कठीण वाटो, अल्लाहसाठी ही फारच सोपी आहे. ही तीच दैवाची समस्या आहे, त्यावर ईमान आणणे आवश्यक आहे. ज्याला हदीसमध्ये अशा प्रकारे सांगण्यात आले, ''अल्लाहतआलाने आकाश व पृथ्वीच्या निर्मितीच्या पन्नास हजार वर्षांपूर्वी, जेव्हांकी त्याचे सिंहासन पाण्यावर होते, सृष्टीचे दैव लिहून टाकले होते,'' (स. मुस्लिम) आणि सुननच्या रिवायत मध्ये आहे, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी सांगितले, ''अल्लाहतआलाने सर्वात प्रथम लेखणी निर्माण केली. आणि तिला सांगितले लिही. तिने विचारले काय लिहूं? अल्लाहतआलाने फर्माविले, ''जे काही होणार आहे, सर्व लिहून टाक.'' म्हणून तिने अल्लाहच्या हुकूमाने, कयामत पर्यंत जे काही होणार होते, सर्व लिहून टाकले.'' (अबुदाऊद, तिर्मिझी)

६) म्हणजे त्यांच्या जवळ न कोणी लिखीत प्रमाण आहे, ज्याला कोणी आकाशी ग्रंथातून हे दाखवू शकतील; न बौद्धिक प्रमाण आहे, ज्याला अल्लाहशिवायच्या उपासनेला पुरावा म्हणून सादर करू शकतील.

وَاِذَا تُتْلٰى عَلَيْهِمْ اٰيٰتُنَا بَيِّنٰتٍ تَعْرِفُ فِيْ وُجُوْهِ الَّذِيْنَ كَفَرُوا الْمُنْكَرَ ؕ يَكَادُوْنَ يَسْطُوْنَ بِالَّذِيْنَ يَتْلُوْنَ عَلَيْهِمْ اٰيٰتِنَا ؕ قُلْ اَفَاُنَبِّئُكُمْ بِشَرٍّ مِّنْ ذٰلِكُمْ ؕ اَلنَّارُ ؕ وَعَدَهَا اللّٰهُ الَّذِيْنَ كَفَرُوْا ؕ وَبِئْسَ الْمَصِيْرُ ﴿٧٢﴾

**आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या वाणीची स्पष्ट स्पष्ट महावाक्ये, वांचली जातात, तेव्हा आपण, काफिरांच्या चेहऱ्यावर नाखुषीचे चिन्ह स्पष्ट ओळखून घेतात. ते फारच जवळ असतात की, आमची महावाक्ये ऐकविणाऱ्यांवर हल्ला करून देतील;(१) आपण सांगून टाका की, काय मी तुम्हास, याच्या पेक्षा सुध्दा जास्त नाखुषींची बातमी देऊ? ती आग आहे. जिचा वायदा अल्लाहने काफिरांशी करून ठेवला आहे.(२) आणि फारच वाईट ठिकाण आहे.** (७२)

يٰۤاَيُّهَا النَّاسُ ضُرِبَ مَثَلٌ فَاسْتَمِعُوْا لَهٗ ؕ اِنَّ الَّذِيْنَ تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ لَنْ يَّخْلُقُوْا ذُبَابًا وَّلَوِ اجْتَمَعُوْا لَهٗ ؕ وَاِنْ يَّسْلُبْهُمُ الذُّبَابُ شَيْـًٔا لَّا يَسْتَنْقِذُوْهُ مِنْهُ ؕ ضَعُفَ الطَّالِبُ وَالْمَطْلُوْبُ ﴿٧٣﴾

**अहो लोकांनो! एक उदाहरण दिले जात आहे, जरा लक्ष देऊन ऐका! अल्लाहच्या शिवाय ज्यांना ज्यांना तुम्ही बोलवित राहिला आहात, ते एक माशी पण निर्माण करू शकत नाही, मग पाहिजे तर सारेच्या सारे पण का जमा होऊन जावोत.(३) किंबहुना जर माशी, यांच्याजवळून कोणी वस्तू घेऊन पळेल, तर हे तिला पण त्यांच्यापासून हिसकावू शकत नाही;(४) मोठा दुर्बल आहे त्याला मागणी करणारा, आणि मोठा दुर्बल(५) आहे तो, ज्याच्याजवळ मागितले जात आहे.** (७३)

१) आपल्या हातांना लांब करून किंवा वाईट साईट बोलून म्हणजे मुशरिक आणि मार्गभ्रष्ट लोकांकरता, अल्लाहची तौहीद (एकेश्वरवाद) आणि पैगंबरी आणि परतून जाण्याचे ठिकाण, याचे वर्णन, सहन होण्याच्या पलीकडे असते, ज्याचे प्रदर्शन, यांच्या चेहऱ्याने आणि केव्हा केव्हा हातांनी आणि तोंडाने होत असते. हिच अवस्था आजच्या बिदअतवाल्यांची आणि मार्गभ्रष्ट झालेल्या समूहांची आहे. जेव्हा त्यांचे बहकणे, कुरआन व हदीसच्या प्रमाणांनी स्पष्ट केली जाते, तर त्यांची वागणूक सुध्दा, कुरआनाची महावाक्ये, आणि सहीह हदीशींच्या, मुकाबल्यांत अशीच असते, ज्याचा खुलासा या महावाक्यांत केला गेला आहे. (फत्हुल कदीर)

२) म्हणजे आतांतर फक्त, अल्लाहची महावाक्ये ऐकून, तुमचे चेहरे बदलून जातात. एक वेळ अशी येईल कीं, जर तुम्ही आपल्या या वागणूकी पासून तौबा केली नाहीं, तर याच्यापेक्षा कितीतरी जास्त वाईट परिस्थिती तुमच्यावर येईल. आणि ते आहे जहन्नमच्या आगीत जळणे. ज्याचा वायदा अल्लाहतआलाने, कुफ्र आणि शिर्कवाल्यांशी करून ठेवला आहे.

३) म्हणजे हे असत्य उपास्य, ज्यांना तुम्ही अल्लाहला सोडून मदतीसाठी बोलवित असतात, हे सर्वच्या सर्व मिळून, एक फारच क्षुल्लक सृष्टी, माशी पण निर्माण करू इच्छीतील, तरी करू शकत नाही. असे असून सुध्दांतुम्ही त्यांनाच आपली इच्छापूर्ती करणारे समजावे, तर तुमची बुध्दी, दु:ख व्यक्त करण्यासारखी आहे. यावरून हे वाटते कीं, अल्लाहच्या शिवाय ज्यांची उपासना केली जात आहे, त्या केवळ दगडाच्या निर्जिव मूर्त्याच असत नव्हत्या, (जसे कीं आजकाल कबर पुजेला योग्य म्हणणारे लोक, सांगत असतात.) किंबहुना त्या बुध्दी आणि समज ठेवणाऱ्या वस्तूंपण होत्या; म्हणजे अल्लाहचे पुण्यवान सेवक पण होते. ज्यांच्या मृत्युनंतर लोकांनी त्यांना अल्लाहचा सरकतदार ठरवून घेतले. याचसाठी अल्लाहतआला फर्मावित आहे कीं, हे सर्व जर एकत्रीत पण होऊन जातील, तर एक क्षुल्लक गोष्ट, माशी, पण निर्माण करू शकत नाहीं. निव्वळ दगडांच्या मूर्तींना, हे आव्हान दिले जाऊ शकत नाही.

४) हे त्यांच्या आणखी असहाय्यता आणि लाचारीचे जाहीर करणे आहे कीं, निर्माण करणे तर कोठे, हे तर माशी पकडून, तिच्या तोंडातून आपली ती वस्तूंपण परत घेऊं शकत नाहीं; जी ती यांच्यापासून हिसकावून घेऊन जाईल.

५) तालिबने अभिप्रेत स्वनिर्मित उपास्य, आणि मतलूबने अभिप्रेत माशी, किंवा काही जवळ तालिबने पुजारी, आणि मतलुबने, त्याचा उपास्य अभिप्रेत आहे हदीसे कुदसी मध्ये खोट्या उपास्यांच्या असहाय्यतेची चर्चा, या शब्दांत आहे. अल्लाहतआला फर्मावितो, ''त्याच्या पेक्षांजास्त जालीम कोण आहे, जो माझ्यासारखे निर्माण करणे, इच्छितो. जर कोणांत खरोखर हे सामर्थ्य आहे, तर त्याने एक कण, किंवा एक जौ च निर्माण करून दाखवावी.'' (स. बुखारी)

مَا قَدَرُوا اللّٰهَ حَقَّ قَدْرِهٖ ۭ اِنَّ اللّٰهَ لَقَوِيٌّ
عَزِيْزٌ ﴿٧٤﴾

त्यांनी अल्लाहच्या मर्तब्याप्रमाणे, त्याची कदर जाणलीच नाही.[१] अल्लाहतआला महाबलवान आणि मोठाच प्रबळ आहे. (७४)

اَللّٰهُ يَصْطَفِيْ مِنَ الْمَلٰۗىِٕكَةِ رُسُلًا وَّمِنَ النَّاسِ ۭ
اِنَّ اللّٰهَ سَمِيْعٌۢ بَصِيْرٌ ﴿٧٥﴾

देवदुतांमधून आणि मानवांमधून, पैगंबरांना अल्लाहच निवडून घेतो.[२] नि:संशय अल्लाहतआला ऐकणारा आणि पाहणारा आहे.[३] (७५)

يَعْلَمُ مَا بَيْنَ اَيْدِيْهِمْ وَمَا خَلْفَهُمْ ۭ وَاِلَى
اللّٰهِ تُرْجَعُ الْاُمُوْرُ ﴿٧٦﴾

तो चांगल्या प्रकारे जाणतो, जे काही यांच्या पुढे आहे. आणि जे काही यांच्या मागे आहे; आणि अल्लाहकडेच सर्व कामे परतविली जातात.[४] (७६)

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا ارْكَعُوْا وَاسْجُدُوْا وَاعْبُدُوْا
رَبَّكُمْ وَافْعَلُوا الْخَيْرَ لَعَلَّكُمْ تُفْلِحُوْنَ ﴿٧٧﴾

अहो ईमानवाल्यांनो! रुकूअ, सजदा करीत रहा;[५] आणि आपल्या पालनकर्त्याच्या उपासनेत लागून रहा. आणि पुण्याची कामे करीत रहा. कारण कीं, तुम्ही सफल होऊन जावे.[६] (७७)

وَجَاهِدُوْا فِي اللّٰهِ حَقَّ جِهَادِهٖ ۭ هُوَ اجْتَبٰىكُمْ وَمَا
جَعَلَ عَلَيْكُمْ فِي الدِّيْنِ مِنْ حَرَجٍ ۭ مِلَّةَ
اَبِيْكُمْ اِبْرٰهِيْمَ ۭ هُوَ سَمّٰىكُمُ الْمُسْلِمِيْنَ ڏ
مِنْ قَبْلُ وَفِيْ هٰذَا لِيَكُوْنَ الرَّسُوْلُ شَهِيْدًا
عَلَيْكُمْ وَتَكُوْنُوْا شُهَدَاۗءَ عَلَي النَّاسِ ښ
فَاَقِيْمُوا الصَّلٰوةَ وَاٰتُوا الزَّكٰوةَ وَاعْتَصِمُوْا
بِاللّٰهِ ۭ هُوَ مَوْلٰىكُمْ ۚ فَنِعْمَ الْمَوْلٰى وَنِعْمَ النَّصِيْرُ ﴿٧٨﴾

आणि अल्लाहच्या मार्गांत तसेच जिहाद करीत रहा, जसा जिहादचा हक्क आहे,[७] त्यानेच तुम्हाला निवडून घेतले आहे. आणि तुमच्यावर धर्माच्या बाबतीत कोणतीही सक्ती केली नाही.[८] धर्म तुमचे वडील[९] इब्राहीमचा, याच (अल्लाह) ने तुमचे[१०] नाव मुसलमान ठेवले आहे, या (कुरआना) च्या पूर्वी सुध्दा, आणि याच्यात सुध्दा कारण की पैगंबराने तुमच्यावर साक्ष होऊन जावे; आणि तुम्ही तमाम लोकांवर साक्षी होऊन जावे.[११] मग तुम्हास पाहिजे की, नमाजींना कायम करा, आणि जकात देत रहा; आणि अल्लाहचा आश्रय धरा; तोच तुमचा मित्र आणि स्वामी आहे; तर किती चांगला पुरस्कर्ता आणि किती उत्तम मददगार आहे! (७८)

१) हेच कारण आहे की, लोक त्याच्या असहाय्य सृष्टीला, त्याच्यासमान आणि सरकतदार ठरवितात. जर त्यांना अल्लाहतआलाची महत्ता आणि ज्ञान, त्याचे सामर्थ्य आणि शक्ती, आणि त्याच्या अमर्यादतेचे खरा खरा अंदाज आणि ज्ञान असेल, तर तो कधीही त्याच्या ईश्वरीय सामर्थ्यात कोणाला सरकतदार ठरविणार नाही.

२) 'रुसुल, रसूल (पाठविलेला, निरोप्या) चे अनेक वचन आहे. अल्लाहतआलाने देवदुतांकडून सुध्दा, रिसालतचे म्हणजे संदेश पाठविण्याचे काम घेतले आहे. जसे ह. जिब्रईल عليه السلام ला. आपल्या वह्यासाठी नेमले, कीं त्यांनी पैगंबराजवळ वहय पोहचवावे. किंवा शिक्षा घेऊन लोकांकडे जावे. आणि लोकांमधून सुद्धा ज्याना इच्छिले पैगंबरी साठी निवळून घेतले. आणि त्यांना लोकांच्या हिदायत आणि मार्गदर्शनासाठी, तैनात केले. हे सर्व अल्लाहचे सेवक होते, जरी नेमलेले आणि निवडक होते. परंतु कशासाठी? अल्लाहच्या अधिकारांत भागीदारी करण्यासाठी? जसे की काही लोकांनी त्यांना अल्लाहचा सरकतदार बनवून घेतला नाही! किंबहुना फक्त अल्लाहचा संदेश पोहोचविण्यासाठी.

३) तो आपल्या भक्तांचे म्हणणे ऐकणारा आहे आणि बसीर आहे, म्हंणजे जाणतो कीं, पैगंबरीला पात्र कोण आहे? जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''या प्रसंगाला तर अल्लाहतआलाच खूप जाणतो की, कोठे त्याने आपली पैगंबरी ठेवावी.'' (सू.अन्आम १२४)

४) जेव्हा सर्व मामल्यांचा केंद्रबिंदू अल्लाहच आहे. तर मग मनुष्य त्याचे आज्ञाभंजन करुन कोठे जाऊ शकतो आणि त्याच्या शिक्षेपासून कसा वाचू शकतो? काय हे त्याच्यासाठी उत्तम नाही की, त्याने त्याच्या आज्ञापालनाचा मार्ग अनुसरुन, त्याची कृपा संपादन करावी? म्हणून पुढच्या महावाक्यांत याचाच खुलासा केला जात आहे.

५) म्हणजे त्या नमाजीला नित्य अदा करा, जी धर्मशास्त्रांत नक्की केली गेली आहे. पुढे भक्तीचा पण हुकूम येत आहे; ज्याच्यात नमाजपण शामील होती, परंतु तिचे महत्त्व आणि श्रेष्ठत्व डोळ्यासमोर ठेवून, तिचा विशेष हुकूम दिला.

६) म्हणजे फलाह (यश), अल्लाह्ची उपासना आणि आज्ञापालन म्हणजे, भलाईची कामे स्वीकारण्यात आहे. अल्लाह्ची उपासना आणि आज्ञापालन, यापासून पळ काढण्यात नाही. निव्वळ ऐहिक साधन सामुग्रीची विपुलता आणि ती मिळणे, यांच्यात नाही, जसे की, बहुतेक लोक समजतात.

७) या जिहादने अभिप्रेत, काहींनी ते मोठे जिहाद धरले आहे, जे अल्लाहच्या कलम्याला बुलंद करण्यासाठी, काफिर आणि मुशरिक लोकांशी केले जाते. आणि काहींनी अल्लाहच्या हुकूमांची अंमलबजावणी की, याच्यात सुध्दा नफ्से अम्मारा (माणसाची इच्छा जी वाईट कामाकडे प्रवृत्त करते) आणि शैतानाशी मुकाबला करावा लागतो. आणि काहींनी, प्रत्येक तो प्रयत्न अभिप्रेत धरला आहे, जो सत्याचे वर्चस्व आणि असत्याचे मस्तक ठेचणे, आणि प्रबळ होण्यासाठी केला जाईल.

८) म्हणजे असा हुकूम दिला नाही, जो माणसाचा जीव सहन करणार नाही. (नाहीतर थोडीफार मेहनत आणि परिश्रम तर प्रत्येक कामात करावेच लागतात.) किंबहुना मागील शरियतींचे काही सख्त आदेश पण, याने रद्द करुन टाकले. याशिवाय पुष्कळशा सोप्या गोष्टी, मुसलमानांना प्रदान केल्यात, ज्या मागील शरियतीमध्ये नव्हत्या.

९) अरब ह. इस्माईल عليه السلام च्या संततीमधून होते. या अनुषंगाने ह. इब्राहीम عليه السلام अरबांचे बाप होते. आणि अरबेतर सुध्दा ह. इब्राहीम عليه السلام एक बुजूर्ग व्यक्तीत्व म्हणून, अशाप्रकारे मान सन्मान करीत असत, ज्याप्रमाणे मुले, आपल्या बापाचा मानसन्मान करतात. म्हणून ते सर्व लोकांचे बाप होते. याशिवाय इस्लामचे पैगंबरांचे ﷺ (अरब असण्याच्या नात्याने) ह. इब्राहीम عليه السلام बाप होते. म्हणून उम्मते मुहम्मदियाचे पण बाप झाले. म्हणून सांगण्यात आले, हा इस्लाम धर्म, ज्याला अल्लाह्ने तुमच्यासाठी पसंत केले आहे, तुमचा बाप ह. इब्राहीम عليه السلام चा धर्म आहे. त्याचेच अनुकरण करा.

१०) 'हुवा' चा मरजा, काहीजवळ ह. इब्राहीम عليه السلام आहेत म्हणजे कुरआनच्या अवतरणापूर्वी, तुमचे नांव मुस्लिम पण, ह. इब्राहीम عليه السلام नेच ठेवले आहे. आणि काहींजवळ मर्जा अल्लाह्तआला आहे. म्हणजे त्यानेच तुमचे नांव मुस्लिम ठेवले आहे.

११) ही साक्ष कयामतच्या दिवशी होईल, जसे की हदीसमध्ये आहे. कृपया पहावे सू. बकर: आ. १४३ चा समास.

महावाक्ये ११८ | (२३) सू. मोमिनुन | रुकूअ ६

ایاتها ١١٨ | (٢٣) سُورَةُ الْمُؤْمِنُونَ مَكِّيَّةٌ (٧٤) | رکوعاتها ٦

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

قَدْ اَفْلَحَ الْمُؤْمِنُوْنَ ۙ﴿۱﴾

**खचित्‌च ईमानवाले सफल झाले**[१] ①

الَّذِيْنَ هُمْ فِيْ صَلَاتِهِمْ خٰشِعُوْنَ ۙ﴿۲﴾

**जे आपल्या नमाजीत नम्रता दाखवितात.**[२] ②

وَالَّذِيْنَ هُمْ عَنِ اللَّغْوِ مُعْرِضُوْنَ ۙ﴿۳﴾

**आणि जे निरर्थक गोष्टींकडून तोंड फिरवून घेतात**[३] ③

وَالَّذِيْنَ هُمْ لِلزَّكٰوةِ فٰعِلُوْنَ ۙ﴿۴﴾

**आणि जे जकात अदा करणारे आहेत**[४] ④

وَالَّذِيْنَ هُمْ لِفُرُوْجِهِمْ حٰفِظُوْنَ ۙ﴿۵﴾

**आणि जे आपली लाज सांभाळतात.** ⑤

اِلَّا عَلٰۤى اَزْوَاجِهِمْ اَوْ مَا مَلَكَتْ اَيْمَانُهُمْ فَاِنَّهُمْ غَيْرُ مَلُوْمِيْنَ ۚ﴿۶﴾

**शिवाय आपल्या पत्नींच्या आणि आपल्या मालकीच्या दासींच्या. खचित्‌च यांच्यांत त्यांच्यावर काही दोष नाही** ⑥

فَمَنِ ابْتَغٰى وَرَآءَ ذٰلِكَ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْعٰدُوْنَ ۚ﴿۷﴾

**याच्या शिवाय जे आणखी इच्छितील, तेच मर्यादेच्या बाहेर जाणारे आहेत**[५] ⑦

وَالَّذِيْنَ هُمْ لِاَمٰنٰتِهِمْ وَعَهْدِهِمْ رٰعُوْنَ ۙ﴿۸﴾

**आणि जे आपल्या अमानती आणि वचनाचे संरक्षण करणारे आहेत**[६] ⑧

وَالَّذِيْنَ هُمْ عَلٰى صَلَوٰتِهِمْ يُحَافِظُوْنَ ۘ﴿۹﴾

**आणि जे आपल्या नमाजीची काळजी घेतात**[७] ⑨

اُولٰٓئِكَ هُمُ الْوٰرِثُوْنَ ۙ﴿۱۰﴾

**हेच वारसदार आहे.** ⑩

الَّذِيْنَ يَرِثُوْنَ الْفِرْدَوْسَ ؕ هُمْ فِيْهَا خٰلِدُوْنَ ﴿۱۱﴾

**जे फिरदौसचे वारस होतील; जेथे ते नेहमी राहतील**[८] ⑪

وَلَقَدْ خَلَقْنَا الْاِنْسَانَ مِنْ سُلٰلَةٍ مِّنْ طِيْنٍ ۚ﴿۱۲﴾

**आणि खचितच आम्ही माणसाला वाजणाऱ्या मातीतून निर्माण केले.**[९] ⑫

ثُمَّ جَعَلْنٰهُ نُطْفَةً فِيْ قَرَارٍ مَّكِيْنٍ ۪﴿۱۳﴾

**मग त्याला विर्यबिंदू बनवून, सुरक्षित जागेत ठेवून दिले.**[१०] ⑬

ثُمَّ خَلَقْنَا النُّطْفَةَ عَلَقَةً فَخَلَقْنَا الْعَلَقَةَ مُضْغَةً فَخَلَقْنَا الْمُضْغَةَ عِظٰمًا فَكَسَوْنَا الْعِظٰمَ لَحْمًا ۗ ثُمَّ اَنْشَاْنٰهُ خَلْقًا اٰخَرَ ؕ فَتَبٰرَكَ اللّٰهُ اَحْسَنُ الْخٰلِقِيْنَ ؕ﴿۱۴﴾

**मग विर्यबिंदुला आम्ही, जमलेले रक्त बनवून दिले, मग त्या रक्ताच्या गोळ्याळा, मांसाचा तुकडा बनवून दिले. मग त्या मांसाच्या तुकड्याला हाडे निर्माण करून दिली; मग हाडांना आम्ही मांस चढवून दिले.**[११] **मग (त्याला आम्ही) एका दुसऱ्या सृष्टीत निर्माण करून दिले.**[१२] **तर तो शुभकारी अल्लाह आहे, जो सर्वांत चांगली निर्मिती करणारा आहे.**[१३] ⑭

१) 'फल्लाह' चा शब्दकोशीय अर्थ आहे, चिरणे, कापणे. शेतकऱ्याला पण फल्लाह म्हटले जाते; की तो जमिनीची चिरफाड करून तिच्यांत बी पेरतो. 'मुफलिह्' (यशस्वी) पण तो होतो, जो संकटांचा सामना करीत, साध्यापर्यंत पोंहचून जातो. किंवा यशस्वी होण्याचे मार्ग त्याच्यासाठी मोकळे होतात. त्याच्यासाठी ते बंद होत नाहीत. शरियतच्या दृष्टीने यशस्वी तो आहे, जो जगात राहून आपल्या पालनकर्त्याला राजी करून घेईल. आणि याच्या बदल्यांत परलोकांत, अल्लाहच्या दयेला आणि क्षमेला पात्र होऊन जाईल. त्याचबरोबर या जगाचे सद्‌भाग्य आणि यशस्वीतापण प्राप्त होऊन जाईल. नाही तर खरे यशस्वी होणे तर परलोकाचेच यशस्वी होणे आहे. जरी या जगांतील लोक, याच्या उलट, ऐहिक सुख सामुग्रीने संपन्न होणाऱ्यालाच यशस्वी समजतात. महावाक्यांत त्या ईमानवाल्यांना यशस्वी होण्याची खुषखबर देण्यांत आली आहे, ज्यांच्यांत खालील वैशिष्टये असतील. उदाहरणार्थ पुढची महावाक्ये पहावीत.

२) खुशूअने अभिप्रेत आहे चित्त आणि अवयवांची एकाग्रता आणि ध्यानमग्नता. चित्ताची एकाग्रता ही आहे की, नमाजीच्या स्थितीत, विचार आणि वसवश्या पासून मनाला सुरक्षित ठेवावे. आणि अल्लाहची महत्ता आणि शान यांचे चित्र आपल्या मनावर रेखाटण्याचा प्रयत्न करणे. अवयवाची एकाग्रता ही आहे की इकडे तिकडे पाहू नये. खेळकूद करू नये. केस आणि कपड्यांना सांवरण्यांत लागू नये. किंबहुना भय, आणि नम्रताची अशी अवस्था असावी, जशी

सर्वसाधारणपणे, बादशाह किंवा कोण्या मोठ्या व्यक्तीसमोर होते.

३) 'लग्व' प्रत्येक ते काम, आणि प्रत्येक ती गोष्ट, ज्यापासून काही फायदा न व्हावा. किंवा त्याच्यांत ऐहिक आणि पारलौकीक नुकसान व्हावे. यापासून वांचण्याचा अर्थ हा आहे की, त्यांच्याकडे लक्ष पण दिले जाऊं नये. तसेच त्यांचा अंगिकार किंवा त्यांच्यासाठी प्रयत्न केला जाऊं नये.

४) याच्याने अभिप्रेत काही जवळ फर्ज जकात आहे. ज्याचा तपशिल म्हणजे तिचा निसाब आणि जकातीचे नियम, जरी मदिनेत सांगण्यांत आले तथापि याचा हुकूम मक्केमध्येच दिला गेला होता. आणि काहींच्या जवळ, अशा कामांचा अंगीकार करणे आहे; ज्यामुळे चित्तशुद्धी आणि चारित्र्य आणि कर्तृत्वाची शुद्धी व्हावी.

५) याच्याने ठाऊक झाले की, 'मुतआ' (तात्पुरता विवाह)ची इस्लाममध्ये अजीबात परवानगी नाही. आणि कामेच्छाच्या समाधानासाठी फक्त दोनच रास्त (जाएज) पद्धती आहेत. पत्नीशी समागम करून, किंवा दासीशी शय्यासबोत करून. परंतु आता फक्त पत्नीच या कामासाठी राहिली आहे. कारण की, खऱ्या अर्थाने दासीचे अस्तित्व संपलेले आहे. तथापि जेव्हांकधी, परिस्थितीने तिला दुसऱ्यांदा अस्तित्व बहाल केले, तर पत्नी प्रमाणेच, तिच्याशी समागम योग्य (जाएज) राहील.

६) 'अमानात' ने अभिप्रेत सोंपवून दिलेल्या रकमेचे परत करणे आहे. रहस्य असलेल्या गोष्टी, आणि धनाच्या ठेवींचे संरक्षण आहे. आणि वचन पालनाने, अल्लाहशी केलेले आणि बंद्यांशी केलेले करार मदार, दोन्ही शामील आहेत.

७) शेवटी पुन्हां, नमाजीच्या काळजीला, यशस्वी होण्यासाठी, आवश्यक ठरविण्यांत आले. ज्यामुळे नमाजीचे महत्त्व आणि श्रेष्ठत्व स्पष्ट आहे. परंतु आज मुसलमानांजवळ, दुसऱ्या नेक कामांप्रमाणे, याचे ही काही महत्त्व राहिलेले नाही. तथापि पैगंबर ﷺ आणि सहाबा ﷺ च्या काळात फक्त नमाजच काफिर आणि ईमानवाल्यांच्या दरम्यान ओळख होती. फइन्नालिल्लाहे व इन्ना इलेहिराजेऊन.

८) या वैशिष्टांनी परिपूर्ण, ईमानवालेच यशस्वी होतील; जे स्वर्गाचे वारसदार, म्हणजे हक्कदार असतील. स्वर्गपण, फिरदौस नांवाचा स्वर्ग. जो स्वर्गाचा उच्च दर्जा आहे. जेथून स्वर्गाचे झरे चालू होतात. (स.बुखारी)

९) मातीपासून निर्माण करण्याचा अर्थ, मानवांचे पितामह ह.आदम عليه السلام ची मातीपासून निर्मिती आहे. किंवा मनुष्य जे खाद्यान्न खातो, ते सर्व मातीतूनच निर्माण होते. या अनुषंगाने त्या विर्यबिंदुचे मूळ, जे मनुष्य निर्मितीला. कारणीभूत बनते, मातीच आहे.

१०) सुरक्षित जागेने अभिप्रेत, आईचे गर्भाशय आहे. जेथे नऊ महिने मूल मोठ्या सुरक्षितपणे रहाते, आणि पालनपोषण पण मिळवते.

११) याचा काही तपशील, सू.हज्जच्या सुरवातीला येऊन चुकला आहे. येथे त्याला पुन्हा सांगण्यात आले आहे. तथापि तेथे 'मुखल्लका' चा जो उल्लेख होता, येथे त्याचा खुलासा, 'मुजगा' मांसाला हाडांमध्ये बदलून देणे आणि हाडांना मांस चढविणे करून देण्यात आला आहे. मुजगा मांसाला हाडांमध्ये बदलून देण्याचा उद्देश्य, मानवी ढाच्याला मजबूत आधारावर उभा करणे आहे. कारण की निव्वळ मांसामध्ये काही टणकपणा आणि काठिण्य असत नाही. जर त्याला निव्वळ हाडांचाच सांगाडा ठेवला गेला असतां, तर माणसांत काही सौंदर्य आणि गुबगुबीत पणा आला नसतां, जो प्रत्येक मनुष्यांत आढळून येतो. म्हणून त्या हाडांवर एका खास प्रमाणांवर मांस चढवून दिले गेले. कोठे कमी कोठे जास्त. कारण की त्याच्या अंगकाठीमध्ये, अयोग्य व बेढबपणा निर्माण न व्हावा. कारण की त्याने रूप सौंदर्याचा एक नमुना, आणि निसर्ग निर्मितीचे एक उत्कृष्ट काम व्हावे. या गोष्टीला कुरआनाने, दुसऱ्या ठिकाणी, अशा प्रकारे सांगितले, ''आम्ही मनुष्याला फार चांगल्या पद्धतीने, किंवा फार चांगल्या ढाच्यांत बनवले. (सू.त्तीन ४)

१२) याच्याने अभिप्रेत ते मूल आहे. जे नऊ महिन्यानंतर, एक खास चेहरा मोहरा घेऊन, आईच्या पोटांतून बाहेर येते. आणि हालचाली बरोबरच ऐकण्याचे पहाण्याचे, आणि समजण्याचे सामर्थ्य पण त्याच्या बरोबर असते.

१३) निर्माण करणारा, येथे त्या कारागिराच्या अर्थांत आहे, जो खास खास प्रमाणांत वस्तू जोडून, कोणी एक वस्तू तयार करीत असतो. म्हणजे या सर्व कारागिरांमध्ये, अल्लाहसारखा पण कोणी कारागीर आहे ? जो अशाप्रकारे कारागिरीचा नमुना सादर करूंशकेल ? जो अल्लाहतआलाने मानवी रूपांत सादर केला आहे. बस ! सर्वांत जास्त भलाई आणि बरकतवाला अल्लाहच आहे. जो तमाम कारागिरांहून मोठा, आणि सर्वांत चांगला सृष्टी निर्माता आहे.

| | |
|---|---|
| **याच्यानंतर तुम्ही सर्व, खचित्‌च मरून जाणार आहात (१५)** | ثُمَّ اِنَّكُمْ بَعْدَ ذٰلِكَ لَمَيِّتُوْنَ ﴿١٥﴾ |
| **मग कयामतच्या दिवशी, कुठल्याही संशयाशिवाय, तुम्ही सर्व उठवून उभे केले जाल (१६)** | ثُمَّ اِنَّكُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ تُبْعَثُوْنَ ﴿١٦﴾ |
| **आणि आम्ही तुमच्यावर सात आकाशे बनविली आहेत; [१] आणि आम्ही निर्माण करण्यापासून अजाण नव्हतो. [२] (१७)** | وَلَقَدْ خَلَقْنَا فَوْقَكُمْ سَبْعَ طَرَآئِقَ ۖ وَمَا كُنَّا عَنِ الْخَلْقِ غٰفِلِيْنَ ﴿١٧﴾ |
| **आणि एका विशिष्ट अंदाजाने आकाशातून पाणी वर्षवितो, [३] मग त्याला जमिनीत तुंबवून ठेवतो. [४] आणि आम्ही त्याला उडवून नेण्यासही समर्थ आहोत. [५] (१८)** | وَاَنْزَلْنَا مِنَ السَّمَآءِ مَآءًۢ بِقَدَرٍ فَاَسْكَنّٰهُ فِى الْاَرْضِ ۖ وَاِنَّا عَلٰى ذَهَابٍۢ بِهٖ لَقٰدِرُوْنَ ﴿١٨﴾ |
| **या पाण्याच्या द्वारे, आम्ही तुमच्यासाठी खजूर आणि द्राक्षांच्या बागा निर्माण करून दिल्या आहेत; की, तुमच्यासाठी याच्यांत पुष्कळसे फळफळादी असतात, त्यांच्यातूनच तुम्ही खाता सुद्धां [६] (१९)** | فَاَنْشَاْنَا لَكُمْ بِهٖ جَنّٰتٍ مِّنْ نَّخِيْلٍ وَّ اَعْنَابٍ ۘ لَكُمْ فِيْهَا فَوَاكِهُ كَثِيْرَةٌ وَّمِنْهَا تَاْكُلُوْنَ ﴿١٩﴾ |
| **आणि तो वृक्ष जो 'तूरे सैना' पर्वतांत उगवितो, जो तेल काढतो आणि खाणाऱ्यांसाठी शाक आहे. [७] (२०)** | وَشَجَرَةً تَخْرُجُ مِنْ طُوْرِ سَيْنَآءَ تَنْۢبُتُ بِالدُّهْنِ وَصِبْغٍ لِّلْاٰكِلِيْنَ ﴿٢٠﴾ |
| **आणि तुमच्यासाठी चतुष्पादांप्रमाणे सुद्धा फार मोठा बोध आहे; त्यांच्या पोटांतून आम्ही तुम्हांस दूध पाजतो; आणखीही पुष्कळशे फायदे तुमच्याकरीतां, त्यांच्यामध्ये, आहेत. त्यांच्यातून काही काहींना तुम्ही खातात सुद्धां (२१)** | وَاِنَّ لَكُمْ فِى الْاَنْعَامِ لَعِبْرَةً ۗ نُسْقِيْكُمْ مِّمَّا فِىْ بُطُوْنِهَا وَلَكُمْ فِيْهَا مَنَافِعُ كَثِيْرَةٌ وَّمِنْهَا تَاْكُلُوْنَ ﴿٢١﴾ |
| **आणि त्यांच्यावर आणि नांवावर, तुम्ही स्वार केले जातात [८] (२२)** | وَعَلَيْهَا وَعَلَى الْفُلْكِ تُحْمَلُوْنَ ﴿٢٢﴾ |

१) 'तराईक' 'तरीका' चे अनेकवचन आहे. अभिप्रेत आकाश आहेत. अरब एकावर एक वस्तुला पण 'तरीका' म्हणतात. आकाश पण एका वर एक आहेत; म्हणून त्यांना पण 'तराईक' म्हटले. किंवा 'तरीका' रस्त्याच्या अर्थांत आहे. आकाश, देवदूतांच्या येण्याजाण्याचा, किंवा ताऱ्यांच्या जाण्यायेण्याचा रस्ता आहे. म्हणून त्यांना 'तराईक' म्हटले.

२) खल्क ने अभिप्रेत सृष्टी आहे. म्हणजे आकाशांना निर्माण करून, आम्ही जमिनीच्या सृष्टीकडून अजाण होऊन गेलो नाही. किंबहुना आम्ही आकाशांना जमिनीवर पडण्यापासून सुरक्षित करून ठेवले आहे. कारण की, सृष्टीने नष्ट होऊ नये. किंवा हा अर्थ आहे की, आम्ही सृष्टीचे प्रयोजन आणि त्यांच्या जीवनाच्या गरजा, याकडून अजाण होऊन गेलो नाहीत; परंतु, आम्हीच त्याची व्यवस्था करीत असतो. (फत्हुल कदीर) आणि काहींनी हा भावार्थ सांगितला आहे की, जमिनीतून जे काही निघते, किंवा तिच्यांत दाखल होते; अशाचप्रकारे आकाशांतून जे उतरते आणि चढते, सर्व त्याच्या ज्ञानांत आहे. आणि प्रत्येक गोष्टीवर तो लक्ष ठेवून आहे. आणि प्रत्येक ठिकाणी तो तुमच्या ज्ञानाच्या दृष्टीने, तुमच्या बरोबर असतो. (इब्ने कसीर)

३) म्हणजे न जास्त की, ज्याच्याने बर्बादी पसरून जाईल आणि न इतके कमी की उत्पन्न आणि दुसऱ्या गरजांसाठी, पुरेसे न व्हावे.

४) म्हणजे ही व्यवस्थापण केली की सर्व पाणी वर्षून, लगेच वाहून न जावे. आणि संपून जाऊ नये. किंबहुना आम्ही, झरे, पाट, नद्या आणि तलाव आणि विहीरीच्या, स्वरूपांत त्याला सुरक्षितपण करून घेतले. (कारण की या सर्वांचे मूळ पण आकाशांतून पडणारा पाऊसच आहे.) कारण की ज्या दिवसांत पाऊस पडणार नाही, किंवा अशा इलाख्यांत जेथे पाऊस कमी होतो, आणि पाण्याची आवश्यकता जास्त आहे, त्यांच्यापासून पाणी मिळवून घेण्यांत यावे.

५) म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही आमच्या कृपेने, पाण्याची अशी विस्तृत व्यवस्था केली आहे; तेथेच आम्ही या गोष्टीवर सुद्धा समर्थ आहोत की, पाण्याची पातळी इतकी खाली करून द्यावी, की तुमच्यासाठी पाणी मिळवणे अशक्य होऊन जावे.

६) म्हणजे या बागांमध्ये खजुर आणि द्राक्षांशिवाय, आणखी पुष्कळशी फळे होतात. ज्यापासून तुम्ही रूची मिळवितात आणि काही खातात.

७) याच्याने जैतूनचा वृक्ष अभिप्रेत आहे. ज्यापासून तेल, आणि ज्याची फळे, भाजी म्हणून उपयोगांत आणले जातात. भाजीला सिबग (रंग) म्हटले आहे. कारण की भाकर, भाजीत बुडवून, जणू रंगविली जाते. तूरे सैना (पर्वत) खास करून अशा उमद्या फळांसाठी सुप्रसिद्ध इलाखा आहे.

८) म्हणून आपल्या पालनकर्त्याच्या अशा देणग्यांनी तुम्ही उपकृत होतात. काय तो या योग्य नाही, की तुम्ही त्याचे आभार मानावेत. आणि फक्त त्याचीच उपासना आणि आज्ञापालन करावे.

وَلَقَدْ اَرْسَلْنَا نُوْحًا اِلٰى قَوْمِهٖ فَقَالَ يٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ اِلٰهٍ غَيْرُهٗ ۭ اَفَلَا تَتَّقُوْنَ ﴿٢٣﴾

आणि खचित्‌च आम्ही नूहला त्याच्या लोकांकडे पैगंबर बनवून पाठविले; त्याने म्हटले हे माझ्या समाज बांधवांनो! अल्लाहची भक्ती करा. त्याच्याशिवाय तुमचा कोणी उपास्य (देव) नाही. काय तुम्ही भीत नाही? (२३)

فَقَالَ الْمَلَؤُا الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ قَوْمِهٖ مَا هٰذَآ اِلَّا بَشَرٌ مِّثْلُكُمْ ۙ يُرِيْدُ اَنْ يَّتَفَضَّلَ عَلَيْكُمْ ۭ وَلَوْ شَاۗءَ اللّٰهُ لَاَنْزَلَ مَلٰۗىِٕكَةً ښ مَّا سَمِعْنَا بِهٰذَا فِيْٓ اٰبَاۗىِٕنَا الْاَوَّلِيْنَ ﴿٢٤﴾

(त्याच्या समाजाच्या) काफिर सरदारांनी स्वच्छ सांगून टाकले की, हा तर तुमच्याच सारखा एक मनुष्य आहे. हा तुमच्यावर वर्चस्व आणि मोठेपणा मिळवू इच्छीत आहे; (१) जर अल्लाहलाच मंजुर असते, तर त्याने कोण्या देवदुताला उतारले असते; (२) असे तर आम्ही आमच्या पूर्वीच्या वाडवडिलांच्या काळांत, ऐकलेच नाही. (३) (२४)

اِنْ هُوَ اِلَّا رَجُلٌۢ بِهٖ جِنَّةٌ فَتَرَبَّصُوْا بِهٖ حَتّٰى حِيْنٍ ﴿٢٥﴾

खचित्‌च या माणसाला वेड लागले आहे, बस! तुम्ही त्याला एका निश्चित वेळेपर्यंत ढील द्या. (४) (२५)

قَالَ رَبِّ انْصُرْنِيْ بِمَا كَذَّبُوْنِ ﴿٢٦﴾

नूहने प्रार्थना केली की हे माझ्या पालनकर्त्या! यांचे मला खोटे ठरविण्यावर, तू माझी मदत कर. (५) (२६)

فَاَوْحَيْنَآ اِلَيْهِ اَنِ اصْنَعِ الْفُلْكَ بِاَعْيُنِنَا وَوَحْيِنَا فَاِذَا جَاۗءَ اَمْرُنَا وَفَارَ التَّنُّوْرُ ۙ فَاسْلُكْ فِيْهَا مِنْ كُلٍّ زَوْجَيْنِ اثْنَيْنِ وَاَهْلَكَ اِلَّا مَنْ سَبَقَ عَلَيْهِ الْقَوْلُ مِنْهُمْ ۚ وَلَا تُخَاطِبْنِيْ فِي الَّذِيْنَ ظَلَمُوْا ۚ اِنَّهُمْ مُّغْرَقُوْنَ ﴿٢٧﴾

तर आम्ही त्याच्याकडे 'वह्य' पाठविले की, तूंआमच्या डोळ्यासमोर, आमच्या वह्याप्रमाणे एक नांव बनीव; मग जेव्हांआमचा हुकूम येऊन लागेल, (६) आणि जेव्हांभट्टी ऊतू जाऊ लागेल, (७) तेव्हा तू प्रत्येक प्रकारचे एक एक जोडपे त्याच्यांत ठेऊन घे. (८) आणि आपल्या कुटुंबालाही; परंतु, यांच्यातून ज्यांच्या बाबतीत, पूर्वीच आमचा हुकूम होऊन चुकला आहे; (९) खबरदार! ज्या लोकांनी जुलूम केला आहे, त्यांच्या बाबतीत माझ्याशी काही बोलू नकोस. ते तर सर्व बुडून जाणार आहेत (१०) (२७)

१) म्हणजे हा तुमचा सारखाच मनुष्य आहे. हा कशाप्रकारे पैगंबर होऊं शकतो ? आणि जर हा पैगंबरीचा दावा करीत आहे, तर याचा खरा उद्देश्य, याच्यांत तुमच्यावर श्रेष्ठत्व आणि मोठेपण प्राप्त करणे आहे.

२) आणि जर खरोखरी अल्लाह, आपल्या पैगंबराच्या मार्फत, आम्हांस हे समजवू इच्छितां, की उपासनेच्या लायक फक्त तोच आहे; तर तो कोण्या देवदुताला पैगंबर बनवून पाठवता, न की कोण्या माणसाला. त्याने येऊन आम्हाला एकेश्वरवादाची समस्या समजाविली असती.

३) म्हणजे त्याचे एकेश्वरवादाचे आवाहन, एक वेगळे आवाहन आहे. याच्या पूर्वी आम्ही, आमच्या वाडवडिलांच्या काळांत, तर असे ऐकलेच नाही.

४) हा आम्हांस आणि आमच्या वाडवडिलांस, मूर्तींची उपासना करण्यामुळे, मूर्ख आणि निर्बुद्ध समजत आहे, आणि म्हणत आहे. असे वाटत की हा स्वत:च वेडा आहे. याला एका वेळेपर्यंत ढील द्या. मृत्युबरोबरच याचे आवाहन संपुष्टात येईल. किंवा शक्य आहे याचे वेडेपण संपून जाईल. आणि त्याच्या आवाहनाला सोडून देईल.

५) साडेनऊशे वर्षाच्या प्रचार आणि प्रसारानंतर, सरशेवटी आपल्या पालनकर्त्याजवळ प्रार्थना केली, ''नूहने आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ केली, मी पराजीत आणि दुर्बल आहे, माझी मदत कर.'' (सू.कमर-१०) अल्लाहने दुआ कबूल केली; आणि हुकूम दिला की, माझ्या देखरेखीखाली, आणि सुचनेप्रमाणे नाव तयार कर.

६) म्हणजे त्यांच्या नष्ट करण्याचा हुकूम येऊन जाईल.

७) तन्नूर (भट्टी) वर समास, सू.हूद मध्ये येऊन चुकला आहे, की खरी गोष्ट ही आहे की, याच्याने अभिप्रेत आमच्या परिचयाची चूल नाही, जिच्यांत भाकरी भाजल्या जातात. किंबहुना जमिनीचा पृष्टभाग आहे; की सर्व जमीन झऱ्यामध्ये बदलून गेली. जमिनीतून पाणी झऱ्या सारखे वाहू लागले. नूह عليه السلام ला सूचना देण्यांत येत आहे की, ''जेव्हा पाणी जमिनीतून उचंबळून येईल,....

८) म्हणजे जनावरे, (प्राणी) वनस्पती, आणि फळे, प्रत्येकांतून एक एक जोडपे (नर आणि मादी) नावेत ठेऊन घे. कारण की सर्वांचा वंश कायम रहावा.

९) म्हणजे ज्यांना नष्ट करण्याचा निर्णय, त्यांच्या कुफ्र आणि अहंकारामुळे, होऊन चुकला आहे. जसे नूह عليه السلام ची पत्नी आणि त्यांचा मुलगा.

१०) म्हणजे जेव्हा शिक्षेची सुरवात होऊन जाईल, या जालिमांमधून कोणावरही दया करण्याची आवश्यकता नाही; की तू कोणाची शिफारस करणे सुरू करून द्यावे. कारण की यांना बुडवून टाकण्याचा पक्का निर्णय झाला आहे.

فَإِذَا اسْتَوَيْتَ أَنْتَ وَمَنْ مَّعَكَ عَلَى الْفُلْكِ فَقُلِ الْحَمْدُ لِلّٰهِ الَّذِي نَجّٰنَا مِنَ الْقَوْمِ الظّٰلِمِيْنَ ﴿٢٨﴾

**जेव्हा तू आणि तुझे साथीदार, नांवेत समाधानपूर्वक बसून जातील, तर म्हण की, सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे. ज्याने आम्हाला जालीम लोकांपासून सुटका दिली. (२८)**

وَقُلْ رَّبِّ أَنْزِلْنِيْ مُنْزَلًا مُّبٰرَكًا وَّأَنْتَ خَيْرُ الْمُنْزِلِيْنَ ﴿٢٩﴾

**आणि असे म्हणावे की, हे माझ्या पालनकर्त्या![१] मला आशीर्वाद पुर्वक उतरणे उतरव; तूच उत्तम उतारणारा आहेस[२] (२९)**

إِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ وَّإِنْ كُنَّا لَمُبْتَلِيْنَ ﴿٣٠﴾

**खचित्च यांत मोठमोठ्या निशाण्या आहेत. [३] आणि आम्हांस नि:संशय परीक्षा घ्यावयाची आहे. [४] (३०)**

ثُمَّ أَنْشَأْنَا مِنْ بَعْدِهِمْ قَرْنًا اٰخَرِيْنَ ﴿٣١﴾

**मग याच्यानंतर आम्ही आणखी (काही) उम्मत निर्माण केली. [५] (३१)**

فَأَرْسَلْنَا فِيْهِمْ رَسُوْلًا مِّنْهُمْ أَنِ اعْبُدُوا اللّٰهَ مَا لَكُمْ مِّنْ إِلٰهٍ غَيْرُهٗ ۚ أَفَلَا تَتَّقُوْنَ ﴿٣٢﴾

**मग त्यांच्यात त्यांच्यातूनच पैगंबर पण पाठविला; [६] की तुम्ही सर्व, अल्लाहची उपासना करा. त्याच्या वाचून तुमचा अन्य कोणी उपास्य नाही. [७] तुम्ही का भीत नाहीत (३२)**

وَقَالَ الْمَلَأُ مِنْ قَوْمِهِ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَكَذَّبُوْا بِلِقَاءِ الْاٰخِرَةِ وَأَتْرَفْنٰهُمْ فِي الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۙ مَا هٰذَا إِلَّا بَشَرٌ مِّثْلُكُمْ ۙ يَأْكُلُ مِمَّا تَأْكُلُوْنَ مِنْهُ وَيَشْرَبُ مِمَّا تَشْرَبُوْنَ ﴿٣٣﴾

**आणि समाजातील[८] सरदारांनी उत्तर दिले, जे लोक कुफ्र करीत होते, आणि परलोकांतील भेटीलाही नाकारत होते; आणि आम्ही ऐहिक आयुष्यांत त्यांना सुखी पण केले होते; [९] की हा तर तुमच्याच सारखा एक मनुष्य आहे. तुमच्याच सारखे अन्न हाही खातो; आणि तुमच्या पिण्याचे पाणी हा पण पितो[१०] (३३)**

१) नावेत बसून, अल्लाहचे आभार मानणे की, त्याने जालिमांना सरशेवटी, बुडवून टाकून, यांच्यापासून सुटका करून दिली, आणि नावेला सुखरूपपणे किनाऱ्याला लाऊन देण्याची दुआ करावी. रब्बी अन्‌जिलनी मुन्‌जलम्‌ मुबारकव्‌ व अन्‌ता खैरूल मुन्‌जिलीन.

२) याच्या बरोबर ती दुआपण म्हणून घेतली जावी, जी नबी ﷺ, स्वारीवर बसतांना म्हणत असत. अल्लाहु अकबर, अल्लाहु अकबर, अल्लाहु अकबर सुबहानल्लजी सख्खर लना हाजा व मा कुन्ना लहु मुकरिनीन व इन्ना इला रब्बिना लमुन कलिबून (सू.जुखरूफ १३-१४)

३) म्हणजे या नूहच्या गोष्टीत, ईमानवाल्यांना मुक्ती आणि काफिरांना नष्ट करून टाकले गेले. या गोष्टीत निशाण्या आहेत की, पैगंबर जे काही अल्लाहकडून घेऊन येतात; त्यात ते खरे आहेत. शिवाय हे की अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे. आणि सत्य आणि असत्त्याच्या झगड्यांत, प्रत्येक गोष्टीला तो जाणतो; आणि वेळ आल्यावर याची दखल घेतो. मग असत्यवाल्यांची अशा प्रकारे पकड करितो की, त्याच्या पंज्यातून कोणी निघूं शकत नाही.

४) आणि आम्ही पैगंबरांच्या मार्फत ही परीक्षा घेत असतो.

५) बहुतेक भाष्यकारांजवळ, नूहच्या लोकानंतर, ज्या लोकांना अल्लाहने निर्माण केले, आणि त्यांच्यात पैगंबर पाठविला, ते 'आद' चे लोक आहेत. कारण की, बहुतेक ठिकाणी, नूहच्या लोकांनंतर वारसदार म्हणून 'आद' चाच उल्लेख केला गेला आहे. कांहीजवळ हे 'समूद' चे लोक आहे. कारण की पुढे जाऊन, यांच्या नष्ट करण्याच्या उल्लेखांत म्हटले गेले आहे की, 'सयहतुन' (भयंकर आरोळी) ने यांना पकडून घेतले. आणि ही शिक्षा समूदच्या लोकांवर आली होती. काहींच्या जवळ हे ह.शोएब عليه السلام चे लोक, मदयनवाले आहेत की, ते पण भयंकर आरोळी ने नष्ट झाले होते.

६) हा पैगंबर सुद्धांआम्ही त्यांच्यातूनच पाठविला; ज्याचे पालन पोषण त्यांच्यातच, झाले होते. ज्याला ते चांगल्याप्रकारे ओळखत होते. त्याचे घराणे, घर, आणि आईबाप, या सर्वांशी ते परिचित होते.

७) त्याने येऊन सर्वांत प्रथम तेच तौहिदचे निमंत्रण दिले; जे प्रत्येक पैगंबराच्या प्रचार आणि प्रसाराचा पहिला भाग राहिला आहे,

८) हे समाजातील सरदारच प्रत्येक काळांत पैगंबरांचे आणि सत्यवादीना नाकारण्यांत अग्रेसर राहिले आहेत. ज्यामुळे बहुतेक लोक ईमान आणण्यापासून वंचित राहत असत. कारण की हे फारच वजनदार लोक असत. लोक त्यांच्याच मागे चालत असत.

९) परलोकाच्या धारणेवर ईमान न आणणे, आणि ऐहिक सुख वस्तुंची विपुलता, ही दोन आधारभूत कारणे होती; आपल्या पैगंबरांवर ईमान न आणण्याची. आजपण असत्यवाले, यांच कारणांच्या आधारावर सत्यवादींचा विरोध, आणि सत्त्याच्या आव्हानापासून पळ काढतात.

१०) म्हणून त्यांनी हे सांगून नकार दिला की, हा तर आमच्याचप्रमाणे खातो पितो. हा अल्लाहचा पैगंबर कसा काय होऊ शकतो? जसे आज पण पुष्कळसे इस्लामच्या दावेदारांकरीता, पैगंबराचे मनुष्य असणे, मान्य करणे फारच जड जाते.

وَلَئِنْ اَطَعْتُمْ بَشَرًا مِّثْلَكُمْ اِنَّكُمْ اِذًا لَّخٰسِرُوْنَ ﴿٣٤﴾

**आणि जर तुम्ही आपल्या सारख्याच माणसाचे आज्ञापालन केले, तर नि:संशय तुम्ही मोठ्याच तोट्यावाले आहात[१] ३४**

اَيَعِدُكُمْ اَنَّكُمْ اِذَا مِتُّمْ وَكُنْتُمْ تُرَابًا وَّعِظَامًا اَنَّكُمْ مُّخْرَجُوْنَ ﴿٣٥﴾

**काय तो तुम्हास या गोष्टीपासून वचन देतो की जेव्हा तुम्ही मरून फक्त माती आणि हाडके बनून राहून जाल, तर तुम्ही पुन्हा जिवंत केले जाल? ३५**

هَيْهَاتَ هَيْهَاتَ لِمَا تُوْعَدُوْنَ ﴿٣٦﴾

**नाही! नाही!! दूर आणि फारच दूर आहे, ज्याचा तुमच्याशी वायदा केला जात आहे.[२] ३६**

اِنْ هِيَ اِلَّا حَيَاتُنَا الدُّنْيَا نَمُوْتُ وَنَحْيَا وَمَا نَحْنُ بِمَبْعُوْثِيْنَ ﴿٣٧﴾

**हे तर केवळ जगातीलच आयुष्य आहे, आम्ही मरत जगत असतो. हे नाही की आम्ही पुन्हा सुद्धा उठवून (उभे केले) जाऊ ३७**

اِنْ هُوَ اِلَّا رَجُلُ ِۨافْتَرٰى عَلَى اللّٰهِ كَذِبًا وَّمَا نَحْنُ لَهٗ بِمُؤْمِنِيْنَ ﴿٣٨﴾

**हा तर तो मनुष्य आहे ज्याने अल्लाहवर खोटे कुभांड रचले आहे.[३] आम्ही तर त्याच्यावर विश्वास ठेवणार नाही. ३८**

قَالَ رَبِّ انْصُرْنِيْ بِمَا كَذَّبُوْنِ ﴿٣٩﴾

**पैगंबराने प्रार्थना केली की माझ्या पालनकर्त्या! यांच्या खोटे ठरविण्यावर तू माझी मदत कर.[४] ३९**

قَالَ عَمَّا قَلِيْلٍ لَّيُصْبِحُنَّ نٰدِمِيْنَ ﴿٤٠﴾

**उत्तर मिळाले की, हे तर फारच लवकर लवकरच आपल्या केल्यावर पश्चात्ताप करू लागतील[५] ४०**

فَاَخَذَتْهُمُ الصَّيْحَةُ بِالْحَقِّ فَجَعَلْنٰهُمْ غُثَآءً ۚ فَبُعْدًا لِّلْقَوْمِ الظّٰلِمِيْنَ ﴿٤١﴾

**सरशेवटी न्यायाच्या मागणी प्रमाणे, (एका भयंकर) आरोळीने[६] त्यांना पकडून घेतले. आणि आम्ही त्यांना केरकचरा करून टाकले,[७] तर जुलमी लोकांना दुरी असो. ४१**

ثُمَّ اَنْشَاْنَا مِنْ بَعْدِهِمْ قُرُوْنًا اٰخَرِيْنَ ﴿٤٢﴾

**मग यांच्या नंतर आम्ही, आणखी पुष्कळशा उम्मत निर्माण केल्या[८] ४२**

१) तो घाटाच आहे की, आपल्याच सारख्या मनुष्याला पैगंबर मानून, तुम्ही त्याच्या श्रेष्ठतेला आणि महत्तेला मान्य करून घेणार, जेव्हाकी एक मनुष्य, दुसऱ्या मनुष्यापेक्षा कसा श्रेष्ठ होऊ शकतो? हा चुकीचा समज आहे, जे पैगंबराच्या मनुष्य होण्याला नाकारतात. वास्तविक अल्लाहतआला ज्या मनुष्याला, पैगंबरीसाठी निवडून घेतो; तर तो या पैगंबरीच्या वह्यामुळे, दुसऱ्या तमाम, जे पैगंबर नाहीत, अशा लोकांवर प्रतिष्ठा आणि श्रेष्ठत्वामध्ये, फार महान आणि उच्च होऊन जातो.

२) 'हय्हाता' ज्याचा अर्थ दूरचा आहे. दोन वेळा ताकीद करता आहे.

३) म्हणजे दुसऱ्यांदा जिवंत होण्याचा वायदा. हे एक खोटे कुभांड आहे, जो हा मनुष्य अल्लाहवर रचत आहे.

४) सरशेवटी ह.नूह عليه السلام प्रमाणे, या पैगंबराने सुद्धा, अल्लाहच्या दरबारांत मदतीसाठी, दुआ करण्याकरीता आपले हात उचलले.

५) म्हणजे फारच लवकर शिक्षा येणार आहे; ज्यावर हे पश्चात्ताप पावतील. परंतु त्यावेळी हे पश्चात्ताप व्यक्त करणे त्यांच्या काही कामा येणार नाही.

६) ही आरोळी, असे म्हणतात की, ह.जिब्रईल عليه السلام ची होती. कांही म्हणतात की, ही फक्त एक भयंकर आरोळी होती, जिच्याबरोबर सोसाट्याचा वारा होता; दोघांनी मिळून त्यांना क्षणार्धात नष्ट करून टाकले.

७) 'गुसाअ्' त्या केरकचऱ्याला म्हणतात, जो पुराच्या पाण्याबरोबर असतो. ज्यांच्यात झाडांची वाळलेली खोडे, वाळलेले गवत, आणि अशाच प्रकारच्या वस्तूअसतात. जेंव्हा पूर ओसरतो, तेव्हा हे वाळून, बेकार पडून असतात. हीच स्थिती त्या गर्विष्ट आणि नाकारणाऱ्यांची झाली.

८) याच्याने अभिप्रेत, ह.सॉलेह عليه السلام; ह.लूत عليه السلام; ह.शोएब عليه السلام चे लोक आहेत. कारण की, सू.आअ्राफ आणि सू.हूद मध्ये, याच क्रमाने त्यांच्या घटना सांगितल्या आहेत. काहींच्या जवळ बनु इस्राईल अभिप्रेत आहेत. 'कुरून' 'करन' चे अनेकवचन आहे. आणि येथे जनतेच्या (उम्मत) अर्थांत उपयोगांत आणला गेला आहे.

مَا تَسْبِقُ مِنْ أُمَّةٍ أَجَلَهَا وَمَا يَسْتَأْخِرُونَ ﴿٤٣﴾

**कोणतीही उम्मत आपल्या वेळेच्या पुढे जाऊ शकली नाही, आणि न मागे राहिली[१] ४३**

ثُمَّ أَرْسَلْنَا رُسُلَنَا تَتْرَا ۖ كُلَّمَا جَاءَ أُمَّةً رَسُولُهَا
كَذَّبُوهُ ۚ فَأَتْبَعْنَا بَعْضَهُمْ بَعْضًا وَجَعَلْنَاهُمْ أَحَادِيثَ ۚ
فَبُعْدًا لِقَوْمٍ لَا يُؤْمِنُونَ ﴿٤٤﴾

**मग आम्ही एकापाठोपाठ एक पैगंबर [२] पाठविले; ज्या उम्मतजवळ त्यांचा पैगंबर आला, तिने (त्याला) नाकरले, मग आम्ही एकीला दुसरीमागे (नायनाट) करीत[३] चाललो; आणि त्यांच्या कथा[४] बनवून टाकल्या. त्या लोकांना दुरी आहे, जे ईमान कबूल करीत नाहीत ४४**

ثُمَّ أَرْسَلْنَا مُوسَىٰ وَأَخَاهُ هَارُونَ ۙ بِآيَاتِنَا وَسُلْطَانٍ
مُبِينٍ ﴿٤٥﴾

**मग आम्ही मूसाला, आणि त्याचा भाऊ हारूनला, आपल्या निशाण्या आणि उघड प्रमाणास [५] पाठविले. ४५**

إِلَىٰ فِرْعَوْنَ وَمَلَئِهِ فَاسْتَكْبَرُوا وَكَانُوا قَوْمًا عَالِينَ ﴿٤٦﴾

**फिरऔन आणि त्याच्या सैन्याकडे; तर त्यांनी गर्व केला आणि ते शिरजोर[६] लोकच होते. ४६**

فَقَالُوا أَنُؤْمِنُ لِبَشَرَيْنِ مِثْلِنَا وَقَوْمُهُمَا لَنَا عَابِدُونَ ﴿٤٧﴾

**ते म्हणू लागले की काय आम्ही आपल्या सारख्याच दोन मनुष्यांवर ईमान आणावे? वास्तविक खुद्द त्यांचेच लोक आमचे सेवक आहेत[७] ४७**

فَكَذَّبُوهُمَا فَكَانُوا مِنَ الْمُهْلَكِينَ ﴿٤٨﴾

**सारांश, त्यांनी त्या दोघांना खोटे ठरविले; सरशेवटी ते पण नष्ट झालेल्या लोकांत जाऊन मिळाले. ४८**

وَلَقَدْ آتَيْنَا مُوسَى الْكِتَابَ لَعَلَّهُمْ يَهْتَدُونَ ﴿٤٩﴾

**आणि आम्ही तर मूसाला पुस्तकपण दिले की, लोकांनी सरळ मार्गाला लागून जावे. [८] ४९**

وَجَعَلْنَا ابْنَ مَرْيَمَ وَأُمَّهُ آيَةً وَآوَيْنَاهُمَا إِلَىٰ رَبْوَةٍ
ذَاتِ قَرَارٍ وَمَعِينٍ ﴿٥٠﴾

**आणि आम्ही मर्यमच्या पुत्राला, आणि त्याच्या आईला एक निशाणी बनविले; आणि या दोघांना उंच सपाट, आणि वाहत्या पाण्याच्या[९] जागेत आश्रय दिला[१०] ५०**

يَا أَيُّهَا الرُّسُلُ كُلُوا مِنَ الطَّيِّبَاتِ وَاعْمَلُوا صَالِحًا ۖ
إِنِّي بِمَا تَعْمَلُونَ عَلِيمٌ ﴿٥١﴾

**हे पैगंबरांनो ! हलाल वस्तू खा; आणि चांगली कामे करा; [११] तुम्ही जे काही करीत आहांत, त्याच्याशी मी चांगल्या प्रकारे वाकब आहे ५१**

وَإِنَّ هَٰذِهِ أُمَّتُكُمْ أُمَّةً وَاحِدَةً وَأَنَا رَبُّكُمْ فَاتَّقُونِ ﴿٥٢﴾

**आणि खचित्‌च तुमचा धर्म एकच धर्म आहे. [१२] आणि मीच तुमचा, सर्वांचा पालनकर्ता आहे; बस तुम्ही मला भीत रहा. ५२**

فَتَقَطَّعُوا أَمْرَهُمْ بَيْنَهُمْ زُبُرًا ۖ كُلُّ حِزْبٍ بِمَا لَدَيْهِمْ
فَرِحُونَ ﴿٥٣﴾

**मग त्यांनी स्वत:च आपल्या धर्मांत, आपसांत तुकडे तुकडे करून घेतले; प्रत्येक समूह जे काही त्याच्या जवळ आहे, त्यावरच ऐट दाखवित आहे. ५३**

فَذَرْهُمْ فِي غَمْرَتِهِمْ حَتَّىٰ حِينٍ ﴿٥٤﴾

**तर आपण सुद्धा त्यांना त्याच्या फसगतीमध्ये, काही काळ पडून राहून द्या [१३] ५४**

१) म्हणजे या सर्व उम्मतीपण नूह आणि आदच्या लोकांप्रमाणे, जेव्हा त्यांचा नष्ट होण्याचा निश्चित वेळ येऊन लागला, तेव्हा तबाह आणि बर्बाद होऊन गेल्या. एक क्षण पण पुढे मागे झाले नाहीत. जसे फर्माविले, ''फ इजा जाअ अजलुहुम् ला यस्त अखिरूना साअतन् व ला यस्तक्दिमून'' (सू.यूनुस - ४९)

२) 'ततरा' चा अर्थ आहे, एका मागून एक, क्रमश: सतत.

३) नष्ट होण्यांत, आणि बरबादी मध्ये. म्हणजे ज्याप्रमाणे एका मागून दुसरे पैगंबर आलेत, त्याचप्रमाणे पैगंबरीला नाकारण्यावर, या उम्मती एका मागून एक शिक्षेत पडून होत्याच्या नव्हत्या झाल्या.

४) अहादीस म्हणजे लोकांच्या तोंडी असणाऱ्या कथा आणि कहाण्या.

५) निशाण्यांनी अभिप्रेत, त्या नऊ निशाण्या आहेत, ज्यांचा उल्लेख सू.आअराफ मध्ये आहे. ज्यांचा खुलासा येऊन चुकला आहे. आणि सुलताने मुबीन ने अभिप्रेत, उघड़ तर्क आणि प्रमाणे आणि पुरावे आहेत; ज्याचे काही उत्तर फिरऔन आणि त्याचे दरबारी देऊ शकले नाहीत.

६) अहंकार आणि आपल्याला मोठे समजणे, याचे मूळ कारण सुद्धा, तेच परलोकाच्या धारणेला नाकारणे, आणि ऐहिक साधन सामुग्रीची मुबलकता होती. ज्याचा उल्लेख मागील लोकांच्या घटनांत येऊन चुकला.

७) येथे ही नाकारण्यासाठी पुरावा त्यांनी, ह.मूसा عليه السلام आणि ह हारून عليه السلام चे मनुष्य असणेच पुढे केले. आणि मनुष्य असण्याच्या पृष्ठर्थ, त्यांनी म्हटले की या दोघांच्या समाजाची माणसे, आमची गुलाम आहेत.

८) इमाम इब्ने कसीर म्हणतात की, ह.मूसा عليه السلام ला तौरात, फिरऔन आणि त्याच्या लोकांना बुडवून टाकल्यानंतर, देण्यात आले. आणि तौरातच्या प्रकटनानंतर, अल्लाहने कुठल्याही समाजाला, सार्वत्रिक शिक्षेत नष्ट केले नाही. किंबहुना ईमानवाल्यांना हा हुकूम देण्यांत आला आहे की, त्यांनी काफिरांशी जिहाद करावे.

९) कारण की ह.ईसा عليه السلام चा जन्म, बापाशिवाय झाला; जी अल्लाहच्या सामर्थ्याची एक निशाणी आहे. ज्याप्रमाणे आदम عليه السلام आईबापांशिवाय, आणि हव्वा, मादीशिवाय ह. आदम पासून आणि दुसऱ्या तमाम माणसांना, आईबापापासून निर्माण करणे, त्याच्या निशाण्यांमधून आहे.

१०) 'रबवतिन' (उंच ठिकाण) ने अभिप्रेत बैतुल मुकद्दस, आणि 'मईन' (वाहता झरा) ने तो झरा अभिप्रेत आहे, जो एका म्हणण्यानुसार, ईसा عليه السلام च्या जन्माच्या वेळी, अल्लाहने निसर्ग नियमाचे विरूद्ध, ह.मर्यमच्या पायांच्या खालून, वाहवून काढला होता; जसे की सू.मर्यममध्ये येऊन चुकले.

११) 'तय्यीबात' ने अभिप्रेत शुद्ध आणि चवदार वस्तू आहेत. काहींनी याचे भाषांतर हलाल वस्तू केले आहे. दोन्हीही आपल्या जागी बरोबर आहे; कारण की, प्रत्येक शुद्ध वस्तू अल्लाहने हलाल ठरविली आहे. आणि प्रत्येक हलाल वस्तू शुद्ध आणि चवदार आहे. घाणेरड्या वस्तूंना अल्लाहतआलाने याचसाठी हराम केले आहे की, त्या परिणामाच्या अनुषंगाने, शुद्ध नाहीत. जरी घाणेरड्या वस्तू खाणाऱ्या लोकांना आपले वातावरण आणि संवयीमुळे, त्यांना एकपटच चव वाटत असावी. चांगली कामे ती आहेत, जी संविधान म्हणजे कुरआन आणि हदीसप्रमाणे असावित; ती नाहीत, ज्यांना लोक चांगले समजतात; कारण की लोकांना तर बिदअतीपण फार चांगल्या वाटतात. किंबहुना बिदअतवाल्यांजवळ जेवढे बिदअतचे पालन आहे, तेवढे इस्लामचे फर्ज आणि सुन्नत आणि मुस्तहब्बात (जे हुजुर सल्ल. नी पसंद केले आहेत) चे पालन पण नाही. हलाल खाण्याबरोबर, चांगली कामे करण्याच्या ताकीदने असे वाटते की, यांचा आपसांत घनिष्ट संबंध आहे. आणि हे एक दुसऱ्याचे, मददगार आहेत. हलाल खाण्याने, चांगली कामे करणे सोपे; आणि चांगली कामे माणसाला, हलाल खाण्याला तयार, आणि त्यावरच समाधान मानण्याचा धडा देतात. याचसाठी अल्लाहने सर्व पैगंबरांना, या दोन्ही गोष्टींचा हुकूम दिला. म्हणूनच सर्व पैगंबर, श्रम करून, हलाल उपजिवीका कमविण्याची आणि खाण्याची, काळजी घेत राहिलेत. ज्याप्रमाणे, ह. दाऊद عليه السلام च्या बाबतीत येते, ''आपल्या हाताच्या कमाईचे खात असत'' (स.बुखारी) आणि नबी ﷺ नी फर्माविले, ''प्रत्येक पैगंबराने बकऱ्या चारल्या आहेत. मी पण मक्कावाल्यांच्या बकऱ्या, काही (करारीत) मोबदल्यात चारत राहिलो आहे.'' (स.बुखारी) आजकाल ब्लॅक मेलर, स्मगलर, लाच आणि व्याज खाणारे, आणि दुसऱ्या हराम खाणाऱ्यांनी, मेहनत मजुरी करून, हलाल रोजी खाणाऱ्यांना, क्षुल्लक आणि मागासलेला वर्ग बनवून टाकले आहे. वास्तविक पाहंता, मामला याच्या बिलकुल उलट आहे. एका इस्लामी समाजांत, हराम खाण्याऱ्यांकरीतां, सन्मान आणि प्रतिष्ठेची जागा नाही, मग जरी ते कारूनच्या खजिन्याचे मालक कांअसत नाही. आदर सन्मानाला पात्र, फक्त ते लोक आहेत, जे काबाड कष्ट करून, हलालची रोजी खातात, मग जरी ती चटणी भाकरच असो. याकरीता नबी ﷺ नी याची फार ताकीद केली आहे; आणि फर्माविले की, अल्लाहतआला हराम कमाईवाल्यांचा दानधर्म कबूल करीत नाही, तसेच त्यांची दुआ पण. (स.मुस्लिम)

१२) 'उम्मतुन' ने अभिप्रेत, धर्म आहे. आणि एक होण्याचा अर्थ हा आहे की, सर्व पैगंबरांनी, एका अल्लाहच्या उपासनेचे आमंत्रण पुढे केले आहे. परंतु लोक एकेश्वरवादाचा धर्म सोडून, वेगवेगळ्या पंथांत आणि गटांत विभागून गेलेत. आणि प्रत्येक समूह, आपल्या धारणा आणि कर्मावर खूष आहे. मग तो सत्यापासून कितीका दूर असेना.

१३) 'गमरतिन' त्या भरपूर पाण्याला म्हणतात, जे जमिनीला झांकून घेते. अज्ञानाचा अंध:कार पण इतका घनघोर असतो की, याच्यांत घेरलेल्या माणसांच्या दृष्टीला सत्य दिसतच नाही. 'गमरतुन' ने अभिप्रेत आश्चर्य फसगत, आणि बहकणे आहे. महावाक्यामध्यें भिवविण्यासाठी म्हणून, त्यांना सोडून देण्याचा हुकूम आहे. प्रवचन आणि उपदेशापासून रोकण्याचा उद्देश नाही.

أَيَحْسَبُونَ أَنَّمَا نُمِدُّهُم بِهِ مِن مَّالٍ وَبَنِينَ ﴿٥٥﴾

काय हे असे समजून बसले आहेत? आम्ही जे काही त्यांच्या संपत्ती आणि संततीमध्ये, वाढवून देत आहोत; ५५

نُسَارِعُ لَهُمْ فِي الْخَيْرَاتِ ۚ بَل لَّا يَشْعُرُونَ ﴿٥٦﴾

हे त्यांच्यासाठी चांगले करण्यासाठी घाई करीत आहेत. (नाही! नाही!!) किंबहुना हे समजतच नाही ५६

إِنَّ الَّذِينَ هُم مِّنْ خَشْيَةِ رَبِّهِم مُّشْفِقُونَ ﴿٥٧﴾

खचितच जे लोक आपल्या पालनकर्त्याच्या धास्तीने भीत रहातात ५७

وَالَّذِينَ هُم بِآيَاتِ رَبِّهِمْ يُؤْمِنُونَ ﴿٥٨﴾

आणि जे आपल्या पालनकर्त्याच्या निशाण्यांवर विश्वास ठेवतात; ५८

وَالَّذِينَ هُم بِرَبِّهِمْ لَا يُشْرِكُونَ ﴿٥٩﴾

आणि जे आपल्या पालनकर्त्या समवेत कोणाला सरकतदार ठरवीत नाहीत ५९

وَالَّذِينَ يُؤْتُونَ مَا آتَوا وَّقُلُوبُهُمْ وَجِلَةٌ أَنَّهُمْ إِلَىٰ رَبِّهِمْ رَاجِعُونَ ﴿٦٠﴾

आणि जे लोक देतात, जेवढे त्यांच्याने देवविले जाते, आणि त्यांची अंत:करणे (भीतीने) थरथर कांपत असतात; की ते आपल्या पालनकर्त्याकडे परतून जाणार आहेत[१] ६०

أُولَٰئِكَ يُسَارِعُونَ فِي الْخَيْرَاتِ وَهُمْ لَهَا سَابِقُونَ ﴿٦١﴾

हेच लोक आहेत, जे चांगल्या कामांत त्वरा करतात; आणि हेच आहे, जे त्यांच्याकडे पुढे सरसावितात ६१

وَلَا نُكَلِّفُ نَفْسًا إِلَّا وُسْعَهَا ۖ وَلَدَيْنَا كِتَابٌ يَنطِقُ بِالْحَقِّ ۚ وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ﴿٦٢﴾

आणि आम्ही कोणत्याही जीवाला त्याच्या शक्तीपलीकडे, त्रास देत नाही; [२] आणि आमच्या जवळ असे पुस्तक आहे की जे सत्य सत्य बोलते; आणि त्यांच्यावर काहीही जुलूम केला जाणार नाही ६२

بَلْ قُلُوبُهُمْ فِي غَمْرَةٍ مِّنْ هَٰذَا وَلَهُمْ أَعْمَالٌ مِّن دُونِ ذَٰلِكَ هُمْ لَهَا عَامِلُونَ ﴿٦٣﴾

किंबहुना यांची अंत:करणे याकडून गफलतीत आहेत; आणि त्यांच्याकरीतां, याच्याशिवाय, अजून पुष्कळशी (बरी वाईट) कर्मे आहेत; [३] ज्यांना ते करीत राहतात ६३

حَتَّىٰ إِذَا أَخَذْنَا مُتْرَفِيهِم بِالْعَذَابِ إِذَا هُمْ يَجْأَرُونَ ﴿٦٤﴾

येथ पावेतो की जेव्हा आम्ही यांच्या सुखी लोकांना शिक्षेत पकडून घेतले, [४] तेव्हा हे गयावया करू लागले ६४

१) म्हणजे अल्लाहच्या मार्गांत खर्च करतात. परंतु अल्लाहला भीत पण राहतात. की कुठल्या कोताईमुळे आमचे कर्म किंवा दानधर्म अमान्य न ठरविण्यांत यावे. हदीसमध्ये येते ह.आयेशा ﵂ ने विचारले भिणारे कोण आहेत ? ते जे मद्य प्राशन करतात, कुकर्म करतात, आणि चोऱ्या करतात? नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, नाही ! किंबहुना हे ते लोक आहेत, जे नमाज पढतात, उपास ठेवतात, आणि दानधर्म करतात, परंतु भित राहतात की कोठे हे अमान्य न ठरविले जावे. (तिर्मिझी, तफसीर सू.मोमिनून, मुसनद अहमद १९५/६ आणि १६०)

२) असेच महावाक्य सू.बकर: चे शेवटी येऊन चुकले आहे.

३) म्हणजे शिर्क शिवाय दुसरे मोठे गुन्हे. किंवा ते कर्म अभिप्रेत आहेत, जे ईमानवाल्यांच्या कर्मां (अल्लाहचे भय, तौहिदवर इमान वगैरे) च्या उलट आहेत. तथापि भावार्थ दोघांचा एकच आहे.

४) 'मुतरफीन' ने अभिप्रेत सुखी लोक आहेत. शिक्षा तर खुशाल आणि गरीब दोघांनाही होते. परंतु सुखी लोकांचे नाव, विशेष करून, कदाचित यासाठी घेतले आहे की समाजाची धुरा, सर्वसाधारण पण त्यांच्याचकडे असते. ते जिकडे इच्छितात तिकडे समाजाला फिरवूंशकतात. जर त्यांनी अल्लाहच्या नाफरमानीचा मार्ग अनुसरला; आणि त्यावर अडिग राहिले, तर त्यांचेच पाहून, समाजपण टस्ने मस होत नाही. आणि पश्चात्तापाकडे येत नाही. येथे 'मुतरफीन' ने अभिप्रेत, ते काफिर आहेत, ज्यांना धनसंपत्तीच्या मुबलकतेने, आणि पुत्र आणि पौत्र देऊन सवलत दिली गेली. जसा की काही महावाक्यापूर्वी याचा उल्लेख केला गेला आहे. किंवा अभिप्रेत चौधरी किंवा सरदार वर्गातील लोक आहेत. आणि शिक्षेने अभिप्रेत जर ऐहिक शिक्षा आहे, तर बद्रच्या युद्धातील जे मक्केचे काफिर मारले गेले, किंबहुना नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या शापाच्या परिणामांत, भूक आणि दुष्काळाची जी शिक्षा त्यांच्यावर लादली गेली होती; ती अपेक्षित आहे. किंवा मग अभिप्रेत, परलोकातील शिक्षा आहे. परंतु हे विषयाच्या अनुषंगाने फार लांब आहे.

لَا تَجْـَٔرُوا الْيَوْمَ ۖ إِنَّكُم مِّنَّا لَا تُنصَرُونَ ﴿٦٥﴾

**आज गया वया करू नका, खचित्च, तुम्हास आमच्या मुकाबल्यात मदत केली जाणार नाही.** [१] ﴿٦٥﴾

قَدْ كَانَتْ آيَاتِي تُتْلَىٰ عَلَيْكُمْ فَكُنتُمْ عَلَىٰ أَعْقَابِكُمْ تَنكِصُونَ ﴿٦٦﴾

**माझी महावाक्ये तर तुमच्या समोर, वांचली जात होती;** [२] **तरी सुद्धा तुम्ही आपल्या पायांवर उलटे पळत होता** [३] ﴿٦٦﴾

مُسْتَكْبِرِينَ بِهِ سَامِرًا تَهْجُرُونَ ﴿٦٧﴾

**(गर्वाने) ऐटून, अकडत** [४] **(असत) गोष्टकरीत, त्याला सोडून देत असत** [५] ﴿٦٧﴾

أَفَلَمْ يَدَّبَّرُوا الْقَوْلَ أَمْ جَاءَهُم مَّا لَمْ يَأْتِ آبَاءَهُمُ الْأَوَّلِينَ ﴿٦٨﴾

**काय त्यांनी या गोष्टीत कधी चिंतन मननच केले नाही.** [६] **किंबहुना त्यांच्याजवळ ते आले जे त्यांच्या वाडवडिलांजवळ आले नव्हते?** [७] ﴿٦٨﴾

أَمْ لَمْ يَعْرِفُوا رَسُولَهُمْ فَهُمْ لَهُ مُنكِرُونَ ﴿٦٩﴾

**किंवा त्यांनी आपल्या पैगंबराला ओळखले नाही की त्याला नाकारणारे होत आहेत?** [८] ﴿٦٩﴾

أَمْ يَقُولُونَ بِهِ جِنَّةٌ ۚ بَلْ جَاءَهُم بِالْحَقِّ وَأَكْثَرُهُمْ لِلْحَقِّ كَارِهُونَ ﴿٧٠﴾

**किंवा हे म्हणतात की, त्याला वेड (लागले) आहे?** [९] **किंबहुना तो तर त्यांच्याजवळ सत्य घेऊन आला आहे. परंतु यांच्यातून बहुतेक सत्याला नापसंत करणारे आहेत.** [१०] ﴿٧٠﴾

१) म्हणजे जगांत अल्लाहच्या शिक्षेत व्यस्त झाल्यानंतर, काही आरडा ओरड आणि गया वया करणे त्यांना अल्लाहच्या पकडीपासून सोडवू शकत नाही, अशाच प्रकारे, परलोकांतील शिक्षेत सुद्धां, त्यांना सोडविणारा आणि मदत करणारा, कोणी असणार नाही.

२) म्हणजे कुरआन मजीद, किंवा अल्लाहचा आदेश, ज्याच्यांत पैगंबरांचे म्हणणे पण शामिल आहेत.

३) 'नुकुस' चा अर्थ, आहे, उलट पावली परत फिरणे परंतु, शाब्दिक अर्थाशिवाय लाक्षणिक अर्थ घेऊन, तोंड फिरविण्याच्या अर्थांत आणि भावार्थांत उपयोगांत आणला जातो. म्हणजे महावाक्ये आणि अल्लाहचे आदेश ऐकून तुम्ही तोंड फिरवून घेत होता. आणि यांच्यापासून पळ काढीत होता.

४) बिही चा मर्जा बहुतेक भाष्यकारांनी बैतुल अतीक, (खाना-ए-काबा) किंवा हरम घेतला आहे. म्हणजे त्यांना आपल्या खाना-ए-काबाचा मुतवल्ली, आणि त्याचा सेवक, आणि देखरेख करण्याचा, जो गर्व होता; त्यामुळे अल्लाहच्या निशाण्यांना नाकारले. आणि काहींनी याचा मर्जा कुरआनाला बनविले आहे. आणि अर्थ हा आहे की, कुरआन ऐकून, यांच्या मनांत गर्व आणि अभिमान निर्माण होतो, जो यांना कुरआनावर ईमान आणण्यापासून प्रतिबंध करतो.

५) 'समर' चा खरा अर्थ चांदणे आहे. सर्व साधारणपणे चांदण्या रात्रींत, काब्याच्या अवती भवती बसून, मक्केचे काफिर गप्पागोष्टी करीत असत. म्हणून हा शब्द रात्रीच्या गप्पा गोष्टींसाठी, उपयोगांत आणला जाऊं लागला. येथे त्याचा अर्थ, खास म्हणून, त्या गोष्टींचा आहे, जो कुरआन करीम आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत ते करीत असत. आणि याच्या आधारावर, सत्य गोष्ट ऐकणे, आणि तिला मान्य करण्याला नाकारत असत; म्हणजे सोडून देत. आणि काहींनी 'हिज्र' चा अर्थ बेहुदा गोष्टी करणे आणि काहींनी अश्लील गोष्टी करणे, असा घेतला आहे. म्हणजे रात्रींच्या गोष्टीमध्ये तुम्ही, कुरआनाच्या शानमध्ये बेहुदा गोष्टी बकतात. किंवा अश्लील गप्पा मारतात ज्यांच्यात काही भलाई नाही (फत्हुल कदीर, अयसरत्त तफासीर)

६) गोष्टीने अभिप्रेत कुरआन करीम आहे; म्हणजे जर याच्यांत मनन केले असते, तर त्यांना याच्यावर ईमान आणण्याची सुबुद्धी नशीबी आली असती.

७) म्हणजे त्यांच्याजवळ तो धर्म आणि शरिअत (धर्मशास्त्र) आली आहे, ज्यापासून त्यांचे वाडवडील, अज्ञान काळांत वंचित् राहिलेत. ज्यावर त्यांना अल्लाहचे आभार मानावयास पाहिजे आणि इस्लाम धर्माला कबूल करून घ्यावयास पाहिजे होते.

८) हे कानउघाडणी म्हणून आहे कारण की ते पैगंबराचा वंश आणि घराणे, आणि अशाच प्रकारे त्याची सत्यता आणि विश्वसनियता, ईमानदारी आणि चारित्र्य आणि कर्तृत्वाची उंची, यांना ते जाणत होते. आणि याला मान्य करीत होते.

९) हे पण कानउघाडणी म्हणून आहे. म्हणजे या पैगंबराने असे कुरआन सादर केले आहे; ज्याच्या सारखे सादर करण्याला सारे जग असमर्थ आहे. अशाचप्रकारे त्याची शिकवण मानवजातीसाठी, रहमत आणि शांतीसाठी कारणीभूत आहे. काय असे कुरआन आणि अशी शिकवण, असा मनुष्य पण सादर करूं शकतो, जो वेडा असावा?

१०) म्हणजे त्यांचे तोंड फिरविणे आणि नाकारणे, याचे खरे कारण, सत्त्याला नापसंद करणे आहे; जे बऱ्याच काळापासून असत्त्याला अंगीकार करून ठेवण्यामुळे, त्यांच्यात निर्माण झाले आहे.

وَلَوِ اتَّبَعَ الْحَقُّ أَهْوَاءَهُمْ لَفَسَدَتِ السَّمٰوٰتُ وَالْأَرْضُ وَمَنْ فِيهِنَّ ۚ بَلْ أَتَيْنٰهُم بِذِكْرِهِمْ فَهُمْ عَن ذِكْرِهِم مُّعْرِضُونَ ﴿٧١﴾

आणि जर सत्यच त्यांच्या मनेच्छेचे अनुकरण करणारे होऊन जाईल, तर पृथ्वी आणि आकाश, आणि त्यांच्या दर्म्यानची प्रत्येक वस्तू (यांची व्यवस्था) केव्हाच अस्ताव्यस्त होऊन गेली असती;[१] सत्य तर हे आहे की, आम्ही त्यांना त्यांचा उपदेश पोहचवून दिला आहे; परंतु ते आपल्या उपदेशांकडून तोंड फिरविणारे आहेत (७१)

أَمْ تَسْأَلُهُمْ خَرْجًا فَخَرَاجُ رَبِّكَ خَيْرٌ ۖ وَهُوَ خَيْرُ الرّٰزِقِينَ ﴿٧٢﴾

काय तुम्ही त्यांच्यापासून काही वेतन मागत आहात? लक्षात ठेवा की तुमच्या पालनकर्त्याचे देणे फारच उत्तम आहे. आणि तो सर्वांत उत्तम अन्नदाता आहे. (७२)

الربع

وَإِنَّكَ لَتَدْعُوهُمْ إِلَىٰ صِرٰطٍ مُّسْتَقِيمٍ ﴿٧٣﴾

आणि खचित्‌च तुम्ही तर त्यांना सरळ मार्गाकडे बोलावित आहात (७३)

وَإِنَّ الَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِالْآخِرَةِ عَنِ الصِّرٰطِ لَنٰكِبُونَ ﴿٧٤﴾

आणि नि:संशय जे लोक परलोकांवर विश्वास ठेवीत नाहीत, ते सरळ मार्गाहून बहकून जाणारे आहेत[२] (७४)

وَلَوْ رَحِمْنٰهُمْ وَكَشَفْنَا مَا بِهِم مِّن ضُرٍّ لَّلَجُّوا فِي طُغْيٰنِهِمْ يَعْمَهُونَ ﴿٧٥﴾

आणि जर आम्ही त्यांच्या वर दया करू, आणि त्यांचा त्रास दूर करून टाकू, तर हे तर, आपल्या आपल्या शिरजोरीत अडून राहून आणखी बहकूं लागले[३] (७५)

وَلَقَدْ أَخَذْنٰهُم بِالْعَذَابِ فَمَا اسْتَكَانُوا لِرَبِّهِمْ وَمَا يَتَضَرَّعُونَ ﴿٧٦﴾

आणि आम्ही त्यांना शिक्षेत पण पकडले, तरी सुद्धा हे लोक आपल्या पालनकर्त्यासमोर वांकले नाहीत. तसेच त्यांनी नम्रता पण धारण केली नाही.[४] (७६)

ع ٤ ٢٧ ٤

حَتَّىٰ إِذَا فَتَحْنَا عَلَيْهِم بَابًا ذَا عَذَابٍ شَدِيدٍ إِذَا هُمْ فِيهِ مُبْلِسُونَ ﴿٧٧﴾

ع ४ २७ ४

येथ पावेतो की जेव्हांआम्ही त्यांच्यावर कडक शिक्षेचा दरवाजा उघडून दिला, तर त्याच वेळी लगेच निराश होऊन गेलेत[५] (७७)

وَهُوَ الَّذِي أَنشَأَ لَكُمُ السَّمْعَ وَالْأَبْصٰرَ وَالْأَفْـِٔدَةَ ۚ قَلِيلًا مَّا تَشْكُرُونَ ﴿٧٨﴾

आणि तोच अल्लाह आहे ज्याने तुमच्याकरीता कान, आणि डोळे आणि अंत:करणे, निर्माण केली; परंतु तुम्ही फारच थोडे आभार मानतात[६] (७८)

१) सत्त्याने अभिप्रेत, धर्म आणि शरिअत आहे. म्हणजे जर धर्म त्यांच्या मनेच्छेप्रमाणे उतरेल, तर उघड गोष्ट आहे की, आकाश आणि पृथ्वीची सारी व्यवस्थाच बिघडून जाईल. उदाहरणार्थ ते इच्छितात की,एका उपास्याच्य ऐवजी, अनेक उपास्य असावेत. जर खरोखर असे झाले, तर विश्वाची व्यवस्था ठीक राहूशकते?

२) म्हणजे सरळ मार्गाहून यांच्या भटकून जाण्यामुळे, परलोकावर त्याचे ईमान नाही.

३) इस्लामच्या विरुद्ध त्यांच्या मनांत जो द्वेष आणि शत्रुत्व होते; आणि कुफ्र आणि शिर्कच्या दलदलमध्ये, ज्याप्रमाणे ते फसलेले होते; याच्यांत त्याचे वर्णन आहे.

४) शिक्षेने अभिप्रेत येथे ती हार आहे, जी बद्रच्या युद्धात मक्केच्या काफिरांची झाली; ज्यांत त्यांची सत्तर माणसे पण मारली गेली होती. किंवा ती दुष्काळाची शिक्षा आहे, जी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या शापाच्या परिणामांत, त्यांच्यावर आला होता. आपण ﷺ नी दुआ केली होती, ''हे अल्लाह! ज्याप्रमाणे ह.यूसुफ عليه السلام च्या काळांत, सात वर्षे दुष्काळ राहिला, अशाच प्रकारे दुष्काळांत यांना ग्रस्त करून, यांच्या मुकाबल्यांत माझी मदत कर.'' (स. बुखारी) म्हणून मक्केचे काफिर या दुष्काळांत ग्रस्त केले गेलेत, ज्यावर ह.अबुसुफयान رضي الله عنه नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या जवळ आले आणि त्यांना अल्लाहचा आणि नाते संबंधाचा वास्ता देऊन, म्हटले की, आतांतर आम्ही जनावरांच्या चामड्या आणि रक्त सुद्धा खाण्याला मजबुर होऊन गेलो आहोत. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (इब्ने कसीर)

५) याच्याने जगातील शिक्षा पण अभिप्रेत होऊ शकते; आणि परलोकाची पण. जेथे ते तमाम सुखचैनी आणि भलाईकडून निराश आणि वंचित् होतील. आणि सर्व आशा धुळीस मिळतील.

६) म्हणजे बुद्धी आणि समज, आणि ऐकण्याची क्षमता प्रदान केली, कारण की, याच्या मार्फत त्यांनी सत्त्याला ओळखावे. ऐकावे, आणि त्याला मान्य करावे. हेच त्या देणग्यांच्या प्रति आभार मानणे आहे. परंतु हे आभार मानणारे सत्त्याचा अंगीकार करणारे फारच थोडे आहेत.

وَهُوَ الَّذِي ذَرَأَكُمْ فِي الْأَرْضِ وَإِلَيْهِ تُحْشَرُونَ ﴿٧٩﴾

**आणि तोच आहे ज्याने तुम्हाला निर्माण करून, जमिनीत फैलवून दिले; आणि त्याच्याचकडे तुम्ही जमा केले जाल[१] (७९)**

وَهُوَ الَّذِي يُحْيِي وَيُمِيتُ وَلَهُ اخْتِلَافُ اللَّيْلِ وَالنَّهَارِ ۚ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿٨٠﴾

**आणि हा तोच आहे जो जगवितो आणि मारतो. आणि रात्र दिवसाचा फेरबदलाचा[२] मुखतार पण तोच आहे. काय तुम्हास समज नाही?[३] (८०)**

بَلْ قَالُوا مِثْلَ مَا قَالَ الْأَوَّلُونَ ﴿٨١﴾

**किंबहुना या लोकांनी अशीच गोष्ट सांगितली जे पूर्वीचे लोक सांगत आले आहेत (८१)**

قَالُوا أَإِذَا مِتْنَا وَكُنَّا تُرَابًا وَعِظَامًا أَإِنَّا لَمَبْعُوثُونَ ﴿٨٢﴾

**त्यांनी म्हटले की, जेव्हा आम्ही मरून, माती आणि हाडे होऊन जाऊ, काय तरी सुद्धा आम्हाला (उठवून) उभे केले जाणार आहे? (८२)**

لَقَدْ وُعِدْنَا نَحْنُ وَآبَاؤُنَا هَٰذَا مِنْ قَبْلُ إِنْ هَٰذَا إِلَّا أَسَاطِيرُ الْأَوَّلِينَ ﴿٨٣﴾

**आम्हाशी आणि आमच्या वाडवडिलांशी, पूर्वीपासूनच हा वायदा होत आला आहे. कांही नाही! ह्या तर फक्त पूर्वीच्या लोकांच्या गप्पा आहेत[४] (८३)**

قُلْ لِمَنِ الْأَرْضُ وَمَنْ فِيهَا إِنْ كُنْتُمْ تَعْلَمُونَ ﴿٨٤﴾

**विचारा तर खरे! की, पृथ्वी आणि तिच्या सर्व वस्तू कोणाच्या आहेत? सांगा, जर तुम्ही जाणत असाल? (८४)**

سَيَقُولُونَ لِلَّهِ ۚ قُلْ أَفَلَا تَذَكَّرُونَ ﴿٨٥﴾

**लगेच उत्तर देतील की, अल्लाहच्या! सांगून टाका की मग तुम्ही उपदेश का ग्रहण करीत नाही? (८५)**

قُلْ مَنْ رَبُّ السَّمَاوَاتِ السَّبْعِ وَرَبُّ الْعَرْشِ الْعَظِيمِ ﴿٨٦﴾

**यांना विचारा की सात आकाशांचा आणि महान अर्ष-सिंहासनाचा मालक कोण आहे? (८६)**

سَيَقُولُونَ لِلَّهِ ۚ قُلْ أَفَلَا تَتَّقُونَ ﴿٨٧﴾

**ते लोक उत्तर देतील की, अल्लाहच आहे; आपण सांगून द्या की, मग तुम्ही का भीत नाहीत?[५] (८७)**

قُلْ مَنْ بِيَدِهِ مَلَكُوتُ كُلِّ شَيْءٍ وَهُوَ يُجِيرُ وَلَا يُجَارُ عَلَيْهِ إِنْ كُنْتُمْ تَعْلَمُونَ ﴿٨٨﴾

**यांना विचारा की सर्व गोष्टींचा अधिकार कोणाच्या हातात आहे? जो आश्रय देतो;[६] आणि ज्याच्या मुकाबल्यांत कोणाला आश्रय दिला जात नाही;[७] जर तुम्हास ठाऊक असेल तर सांगा! (८८)**

१) याच्यात अल्लाहच्या अचाट सामर्थ्याचे वर्णन आहे; की ज्याप्रमाणे त्याने तुम्हाला निर्माण करून, निरनिराळ्या भागात फैलावून दिले आहे. तुमचे रंग सुद्धा, एका दुसऱ्यापेक्षा निरनिराळे आहेत. भाषापण वेगवेगळ्या आणि संवयी आणि कार्यपद्धती पण वेगवेगळ्या. मग एक वेळ येईल, की तुम्हांसर्वांस जिवंत करून, तो आपल्या दरबारांत गोळा करीन.

२) म्हणजे रात्री नंतर दिवस, आणि दिवसानंतर रात्रीचे येणे, मग रात्र आणि दिवसाचे लहान मोठे होणे.

३) ज्याने तुम्ही समजूंशकावे. की, हे सर्व काही एका अल्लाहकडून आहे. ज्याचे प्रत्येक वस्तुंवर वर्चस्व आहे. आणि त्याचे समोर प्रत्येक वस्तू नतमस्तक आहे.

४) 'असातीर' म्हणजे लिहलेल्या कहाण्या. म्हणजे दुसऱ्यांदा जिवंत होऊन उठण्याचा वायदा केव्हांपासून होत आला आहे, आमच्या वाडवडिलांपासून! परंतु आतांपर्यंत प्रत्यक्षांत तर आला नाही. ज्याचा स्वच्छ अर्थ हा आहे की, या कहाण्या आहेत, ज्या पूर्वीच्या लोकांनी आपल्या पुस्तकांत लिहून दिल्या आहेत. ज्या नक्कल पासून नक्कल होत, चालत आल्या आहेत; ज्यांची काही वास्तविकता नाही.

५) म्हणजे जेव्हा तुम्हास मान्य आहे की, पृथ्वीचा आणि तिच्यांत आढळून येणाऱ्या सर्व वस्तुंचा निर्माता पण एक अल्लाहच आहे, आणि आकाश आणि महासिंहासनाचा स्वामी पण तोच आहे, तर मग तुम्हांस हे मान्य करण्यांत विलंब का आहे की उपासनेच्या लायकपण, फक्त तोच एक अल्लाह आहे? मग तुम्ही त्याच्या एक होण्याला मान्य करून, त्या शिक्षेपासून वांचण्याची काळजी का करीत नाही?

६) म्हणजे ज्याचे तो संरक्षण करू इच्छील, आणि त्याला आपल्या आश्रयांत घेऊन घेईल; काय त्याला कोणी नुकसान पोहचवू शकतो?

७) म्हणजे ज्याला तो नुकसान पोहचवू इच्छील, काय ब्रम्हांडांत अल्लाहच्या शिवाय कोणी असे व्यक्तीत्व आहे, जे त्याला नुकसानापासून वांचवून घेईल ? आणि अल्लाहच्या मुकाबल्यात आपल्या आश्रयांत घेऊन घेईल?

سَيَقُوْلُوْنَ لِلّٰهِ ؕ قُلْ فَاَنّٰى تُسْحَرُوْنَ ﴿٨٩﴾

ते हेच उत्तर देतील की अल्लाहच आहे; आपण सांगून द्या की, मग तुम्ही कोठे जादू करून दिले जात आहात?[१] ८९

بَلْ اَتَيْنٰهُمْ بِالْحَقِّ وَاِنَّهُمْ لَكٰذِبُوْنَ ﴿٩٠﴾

सत्य हे आहे की, आम्ही त्यांना सत्य पोहचवून दिले आहे, आणि हे नि:संशय खोटारडे आहेत ९०

مَا اتَّخَذَ اللّٰهُ مِنْ وَّلَدٍ وَّمَا كَانَ مَعَهٗ مِنْ اِلٰهٍ اِذًا لَّذَهَبَ كُلُّ اِلٰهٍۢ بِمَا خَلَقَ وَلَعَلَا بَعْضُهُمْ عَلٰى بَعْضٍ ؕ سُبْحٰنَ اللّٰهِ عَمَّا يَصِفُوْنَ ﴿٩١﴾

न तर अल्लाहने कोणाला आपला मुलगा बनवला, न त्याच्या बरोबर आणखी कोणी उपास्य आहे; नाही तर प्रत्येक उपास्य आपल्या सृष्टीला घेऊन घेऊन फिरतांआणि प्रत्येक दुसऱ्यावर श्रेष्ठ होऊ इच्छिता; जी वैशिष्टये हे दाखवितात, त्या पेक्षा अल्लाह पवित्र आहे. ९१

عٰلِمِ الْغَيْبِ وَالشَّهَادَةِ فَتَعٰلٰى عَمَّا يُشْرِكُوْنَ ﴿٩٢﴾

तो दृष्य आणि अदृष्याचा ज्ञाता आहे; आणि जे शिर्क हे करतात, त्यापासून तो थोर आहे ९२

قُلْ رَّبِّ اِمَّا تُرِيَنِّيْ مَا يُوْعَدُوْنَ ﴿٩٣﴾

आपण प्रार्थना करा की, हे माझ्या पालनकर्त्या! जर तू मला ते दाखवशील ज्याचा वायदा, यांच्याशी केला जात आहे, ९३

رَبِّ فَلَا تَجْعَلْنِيْ فِي الْقَوْمِ الظّٰلِمِيْنَ ﴿٩٤﴾

तर हे माझ्या पालनकर्त्या! तू मला या जालीमांच्या समूहात करू नकोस[२] ९४

وَاِنَّا عَلٰٓى اَنْ نُّرِيَكَ مَا نَعِدُهُمْ لَقٰدِرُوْنَ ﴿٩٥﴾

आणि आम्ही जे काही वायदे यांना देत आहोत, सर्व आपणास दाखवून देण्याला खचित्‌च आम्ही समर्थ आहोत ९५

اِدْفَعْ بِالَّتِيْ هِيَ اَحْسَنُ السَّيِّئَةَ ؕ نَحْنُ اَعْلَمُ بِمَا يَصِفُوْنَ ﴿٩٦﴾

वाईटाचे अशा प्रकारे निर्सन करावे, जे निव्वळ उत्तम असेल,[३] जे काही हे व्यक्त करतात आम्ही ते खूप जाणत आहोत ९६

१) म्हणजे मग तुमच्या बुद्धीला काय झाले आहे की, याला मान्य केल्यावर आणि ज्ञान असून सुद्धा, तुम्ही दुसऱ्यांना त्याच्या उपासनेमध्ये शामील करतात? कुरआन करीमच्या या खुलाशाने स्पष्ट आहे की, मक्केचे मुशरिक, अल्लाहतआलाचे पालकत्त्व, त्याची निर्माण करण्याची क्षमता, आणि त्याचे स्वामी होणे, आणि रोजी देणारा असणे, याला नाकारत नव्हते; किंबहुना ते या सर्व गोष्टी मान्य करीत असत. त्यांना फक्त एकेश्वरवादाने, एकच उपास्य होणे मंजुर नव्हते. म्हणजे उपासना फक्त एका अल्लाहची करीत नव्हते; किंबहुना याच्यात दुसऱ्यांनाही सरकतदार बनवित असत. यासाठी नाही, की, आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, किंवा त्यांच्या व्यवस्थेत, आणखी कोणी सहभागी आहे; किंबहुना फक्त आणि फक्त या चुकीच्या धारणेच्या आधारावर, की, हे पण अल्लाहचे नेक बंदे होते, त्यांना पण अल्लाहने काही अधिकार देऊन ठेवले आहेत; आणि आम्ही त्यांच्या मार्फत, अल्लाहचे सानिध्य प्राप्त करतो. हीच घोडचूक आजकालच्या, मृतांची पूजा करणाऱ्या बिदअतीवाल्यांची आहे. ज्याच्या आधारावर ते मृत पावलेल्यांना मदतीसाठी बोलावित असतात. त्यांच्या नांवाचा नवस फेडतात; आणि त्यांना अल्लाहच्या उपासनेत सरकतदार ठरवितात. वास्तविक अल्लाहने कोठेही असे सांगितले नाही, की, मी कोण्या मृत पावलेल्या बुजूर्ग, किंवा वली, किंवा पैगंबराला अधिकार देऊन ठेवले आहेत. तुम्ही यांच्या मार्फत माझी जवळीक साधा. किंवा त्यांना मदतीसाठी बोलवा. किंवा त्यांच्या नांवाने नवस फेडा. याचसाठी अल्लाहने पुढे सांगितले की, आम्ही त्यांना सत्य पोहचवूंन दिले. म्हणजे हे चांगल्या प्रकारे स्पष्ट करून दिले की, अल्लाहशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. आणि जर हे अल्लाहच्या उपासनेत दुसऱ्यांना शामील करीत आहे, तर यासाठी नाही की यांच्याजवळ याचे काही प्रमाण आहे. नाही! केवळ एक दुसऱ्याचे पाहून, आणि वाडवडिलांच्या अनुकरणामुळे या शिर्कचा अवलंब करीत आहेत. नाहीतर वास्तवांत हे बिल्कुल खोटारडे आहेत. न त्याची कोणी संतती आहे, न त्याचा कोणी सरकतदार. जर असे असते तर, प्रत्येक सरकतदार आपल्या वाट्यांच्या सृष्टीची व्यवस्था, आपल्या मर्जीने करतां; आणि प्रत्येक सरकदतार, दुसऱ्यावर प्रबळ होण्याचा प्रयत्न करतां. आणि जेव्हा असे नाही, आणि ब्रम्हांडाच्या व्यवस्थेत, असा ताणतणाव नाही; तर खचित्‌च अल्लाहतआला, या सर्व गोष्टींपासून पवित्र आहे. आणि थोर आहे, जे मुशरिक लोक त्याच्या बाबतीत सांगत असतात.

२) म्हणून हदीसमध्ये येते की, नबी ﷺ दुआ करीत असत की, ''हे अल्लाह! जेव्हा तू कोण्या लोकांवर परीक्षा किंवा शिक्षा पाठविण्याचा निर्णय करून घेशील, तर त्यापूर्वी मला जगातून उचलून घे! '' (तिर्मिझी तफसीर सू.सॉद व मुसनद अहमद, जि.५ पृ.२४३)

३) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''वाईटाला चांगल्याने नष्ट करा'' याचा परिणाम हा होईल की, तुमचा शत्रुपण तुमचा घनिष्ट मित्र होऊन जाईन.'' (हा मीम सजदा ३४)

وَقُلْ رَّبِّ أَعُوذُ بِكَ مِنْ هَمَزَاتِ الشَّيَاطِينِ ﴿٩٧﴾

आणि प्रार्थना करावी, हे माझ्या पालनकर्त्या! मी शैतानांनी ध्वनीत केलेल्या गोष्टींपासून मी तुझा आश्रय मागतो.[१] ९७

وَأَعُوذُ بِكَ رَبِّ أَن يَحْضُرُونِ ﴿٩٨﴾

आणि हे माझ्या पालनकर्त्या! मी तुझा आश्रय मागतो की, त्याने माझ्याजवळ यावे[२] ९८

حَتَّىٰ إِذَا جَاءَ أَحَدَهُمُ الْمَوْتُ قَالَ رَبِّ ارْجِعُونِ ﴿٩٩﴾

येथ पावेतो की, त्यांच्यातून कोणाला मृत्यू येऊ लागतो, तेव्हा म्हणतो, हे माझ्या पालनकर्त्या! मला परत पाठवून दे ९९

لَعَلِّي أَعْمَلُ صَالِحًا فِيمَا تَرَكْتُ ۚ كَلَّا ۚ إِنَّهَا كَلِمَةٌ هُوَ قَائِلُهَا ۖ وَمِن وَرَائِهِم بَرْزَخٌ إِلَىٰ يَوْمِ يُبْعَثُونَ ﴿١٠٠﴾

की आपल्या सोडून आलेल्या जगांत जाऊन चांगली कामे करून [३] घेईन; असे मुळीच होणार नाही. [४] हे तर फक्त त्याचे म्हणणे आहे, जे तो म्हणत आहे; [५] आणि या लोकांच्या पलीकडे तर एक (पडदा) 'बरजख' आहे, त्यांच्या दुसऱ्यांदा जिवंत होऊन उठण्याच्या दिवसापर्यंत[६] १००

فَإِذَا نُفِخَ فِي الصُّورِ فَلَا أَنسَابَ بَيْنَهُمْ يَوْمَئِذٍ وَلَا يَتَسَاءَلُونَ ﴿١٠١﴾

मग जेव्हा सूर फुंकून दिला जाईल, त्या दिवशी न तर आपसातील नाते संबंधच राहतील, न आपसांत काही विचारपूस[७] १०१

فَمَن ثَقُلَتْ مَوَازِينُهُ فَأُولَٰئِكَ هُمُ الْمُفْلِحُونَ ﴿١٠٢﴾

ज्यांच्या तराजूचे पारडे जड होऊन जाईल, ते तर मुक्ती मिळविणारे होऊन जातील १०२

وَمَنْ خَفَّتْ مَوَازِينُهُ فَأُولَٰئِكَ الَّذِينَ خَسِرُوا أَنفُسَهُمْ فِي جَهَنَّمَ خَالِدُونَ ﴿١٠٣﴾

आणि ज्यांच्या तराजूचे पारडे हलके होऊन गेले, हे आहेत ते, ज्यांनी आपले नुकसान आपणच करून घेतले. जे सर्वकाल (जहन्नम) – नरकाग्नीत राहतील १०३

تَلْفَحُ وُجُوهَهُمُ النَّارُ وَهُمْ فِيهَا كَالِحُونَ ﴿١٠٤﴾

त्यांच्या चेहऱ्याला आग होरपळत असेल; [८] आणि तेथे ते वाईट चेहऱ्याचे झाले असतील[९] १०४

أَلَمْ تَكُنْ آيَاتِي تُتْلَىٰ عَلَيْكُمْ فَكُنتُم بِهَا تُكَذِّبُونَ ﴿١٠٥﴾

काय माझी महावाक्ये तुमच्या समोर वांचली जात नव्हती? तरी सुद्धा तुम्ही त्यांना खोटे म्हणत होता १०५

قَالُوا رَبَّنَا غَلَبَتْ عَلَيْنَا شِقْوَتُنَا وَكُنَّا قَوْمًا ضَالِّينَ ﴿١٠٦﴾

ते म्हणतील की हे आमच्या पालनकर्त्या! आमचे दुर्दैव आमच्यावर प्रबळ[१०] झाले. (खरोखर) आम्ही होतोच बहकलेलो १०६

رَبَّنَا أَخْرِجْنَا مِنْهَا فَإِنْ عُدْنَا فَإِنَّا ظَالِمُونَ ﴿١٠٧﴾

हे आमच्या पालनकर्त्या! आमची येथून सुटका कर; जर आता सुद्धा आम्ही असेच करू, तर नि:संशय आम्ही जालीम आहोत. १०७

قَالَ اخْسَئُوا فِيهَا وَلَا تُكَلِّمُونِ ﴿١٠٨﴾

अल्लाहतआला म्हणेल, फटकारलेले येथेच पडून रहा आणि माझ्याशी संभाषण करू नका १०८

إِنَّهُ كَانَ فَرِيقٌ مِّنْ عِبَادِي يَقُولُونَ رَبَّنَا آمَنَّا فَاغْفِرْ لَنَا وَارْحَمْنَا وَأَنتَ خَيْرُ الرَّاحِمِينَ ﴿١٠٩﴾

माझ्या सेवकांचा एक समूह होता, तो बरोबर हेच म्हणत राहिला, की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही ईमान आणून चुकलो आहोत; तू आम्हांस क्षमा कर, आणि आमच्यावर दया कर, तू सर्व दयाकर्त्यांत, जास्त दया करणारा आहेस १०९

فَاتَّخَذْتُمُوهُمْ سِخْرِيًّا حَتَّىٰ أَنسَوْكُمْ ذِكْرِي وَكُنتُم مِّنْهُمْ تَضْحَكُونَ ﴿١١٠﴾

परंतु तुम्ही त्यांची टर उडवीत राहिला; येथ पावेतो की, त्यांच्या मागे पडून तुम्ही माझ्या स्मरणाला, विसरून गेलेत, आणि तुम्ही त्यांच्याशी हंसेच करीत राहिला. ११०

إِنِّي جَزَيْتُهُمُ الْيَوْمَ بِمَا صَبَرُوا أَنَّهُمْ هُمُ الْفَائِزُونَ ﴿١١١﴾

मी आज त्यांना, त्यांच्या सहनशिलतेचा बदला देऊन दिला आहे; की, ते मनस्वी कृतार्थ होऊन आपल्या ध्येयाप्रत पोहचून चुकले आहेत[११] १११

१) म्हणून नबी ﷺ, शैतानापासून अशा प्रकारे आश्रय मागीत, ''आऊजो बिल्लाहिस् समीईल अलीम मिनशैतान् निर्‌रजीम. मिन हमजे ही व नफखिही व नफसिही'' (अबु दाऊद, तिर्मिझी)

२) यासाठी नबी ﷺ नी ताकीद दिली की, प्रत्येक महत्त्वाच्या कामाची सुरवात, अल्लाहच्या नांवाने करा;

म्हणजे बिस्मिल्लाह् म्हणून. कारण की अल्लाहचे स्मरण शैतानाला दूर करणारी गोष्ट आहे. यासाठी आपण ﷺ ही दुआपण मागत असत. अल्लाहुम्मा इन्नी आऊजो बिका मिनल हरमी व आऊजो बिका मिनल् हदमि व मिनल गर्कि व आऊजो बिका अय् यत खब्बत नीयश शैतानु इन्दल मौत (अबुदाऊद)
रात्रीच्या घाबरण्यात आपण ही दुआ पण मागत असत. बिस्मिल्लाहे आऊजो बि कलमातिल्लाहित् ताम्मती मिन गजबिही व इकाबिही व मिन शर्री इबादिही व मिन हमजातिश शयातीन व अय् यहजरुन (मुसनद अहमद १८१/२, अबुदाऊद, किताबुल तिब्ब, बाब कयफा अलरकी तिर्मिझी बाबुल दअवात)
३) ही इच्छा प्रत्येक काफिर मृत्युच्या वेळी, दुसऱ्यांदा उठविण्याच्या वेळेला अल्लाहसमोर उभा राहील, तेव्हां, आणि नरकाग्नीत ढकलून दिला जाईल, त्यावेळी करतो; आणि करेल. परंतु याचा काही उपयोग होणार नाही. कुरआन करीममध्ये, या विषयाला अनेक ठिकाणी सांगण्यांत आले आहे. उदाहरणार्थ, सू.मुनाफिकून १०-११, सू.इब्राहीम ४४, सू.आअराफ-५३, अलिफलाम मीम सज्दा-१२, सू.अन्आम-२७/२८, सू.शुरा-२४, सू.मोमिन-११/१२, सू.फातिर-३७, वगैरे.
४) 'कल्ला', दांट दपटसाठी आहे. म्हणजे असे कधी होऊ शकत नाही की, त्यांना दुसऱ्यांदा जगांत पाठवून दिले जाईल.
५) याचा एक अर्थ तर हा आहे की, अशी गोष्ट आहे की, प्रत्येक काफिर मृत्युच्या वेळी म्हणतो. दुसरा अर्थ आहे की फक्त गोष्टच गोष्ट आहे. अंमलबजावणी नाही. जर त्यांना दुसऱ्यांदापण जगांत पाठवून दिले जाईल, तर त्यांचे हे म्हणणे, म्हणणेच राहील. चांगली कामे करण्याची सुबुद्धी त्यांना तरी सुद्धा नशीबी होणार नाही. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जर त्यांना जगांत परत पाठवून दिले जाईल, तरी सुद्धा हे तेच कामे करतील, ज्यापासून त्यांना मना करण्यांत आले होते.'' (सू.अन्आम-२८) ह.कतादा ﵁ फर्मावितात, काफिरांच्या या इच्छेमध्ये आमच्यासाठी मोठा धडा आहे. काफिर जगांमध्ये आपले कुटुंब आणि घराण्यामध्ये जाण्याची इच्छा करणार नाही. किंबहुना चांगली कामे करण्यासाठी, जगांत येण्याची इच्छा करेल. म्हणून जीवनाच्या घटीकांना सुवर्ण संधी समजून जास्तीत जास्त चांगली कामे करून घेतली जावीत. कारण की उद्यां, कयामतच्या दिवशी, ही आकांक्षा करण्याची आवश्यकता पुढे न यावी (इब्ने कसीर)
६) दोन वस्तुंच्या दर्म्यान पर्दा आणि आडला 'बरजख' म्हटले जाते. जगातील जीवन आणि परलोकातील जीवन, याच्यांत जो अंतराळ आहे. त्याला येथे 'बरजख' संबोधन्यात आले आहे. कारण की मेल्यानंतर, मनुष्याचा संबंध ऐहिक जीवनाशी संपून जातो. आणि परलोकाच्या जीवनाचा प्रारंभ त्या वेळी होईल; जेव्हांतमाम माणसांना दुसऱ्यांदा जिवंत केले जाईल. हे दर्म्यानचे जीवन कबरीमध्ये, किंवा पक्षाच्या पोटांत, किंवा जाळून टाकण्याच्या स्वरूपांत, मातीच्या कणांत, घालविले जाते. हे 'बरजख' चे जीवन आहे. माणसाचे हे अस्तित्व जेथे पण आणि ज्या स्वरूपांत पण असेल, उघडरित्या, तो मातीत मिसळून, माती होऊन गेला असेल, किंवा राख बनवून हवेत उडवून दिला गेला असेल, किंवा नद्यांमध्ये वाहवून दिला गेला असेल, किंवा कोण्या प्राण्याचे अन्न बनून गेला असेल, परंतु अल्लाहतआला त्या सर्वांना एक नवे अस्तित्व बहाल करून, महेशरच्या मैदानांत जमा करेल.
७) महेशरच्या भयानकतेमुळे, सुरवातीला असे होईल. नंतर ते एक दुसऱ्याला ओळखतील सुद्धां, आणि एक दुसऱ्यांशी विचारपूस पण करतील.
८) चेहऱ्याचा उल्लेख यासाठी केला आहे की, माणसाचे अस्तित्वाचा सर्वांत महत्त्वाचा आणि प्रतिष्ठीत भाग आहे; नाही तर नरकाग्नीची आग सबंध शरीराला आपल्या घेऱ्यात घेईल.
९) 'कलहुन' चा अर्थ होतो ओंठ, आकुंचन पाऊन, दात दिसू लागावेत. ओंठ जणू दातांचा पोषाख आहे; जेव्हा हे नरकाग्नीच्या आगीने कमी होऊन, आंकडून जातील, तर दांत दिसू लागतील; ज्यामुळे माणसाचा चेहरा कुरूप आणि भयावह होऊन जाईल.
१०) मजा, चवी आणि कामवासनांना, ज्या मनुष्यावर प्रबळ राहतात, येथे दुर्दैवाने संबोधन्यांत आले आहे. कारण यांचा परिणाम कायमचे दुर्दैव आहे.
११) या जगांत ईमानवाल्यांसाठी एक सहनशिलतेची कसोटी घेणारा प्रसंग हा पण असतो की, ते धर्म आणि ईमानाच्या मागणीनुसार जेव्हा कर्म करीतात, तेव्हा धर्माची समज नसणारे आणि ईमानाकडून बेखबर लोक, त्यांना थट्टा आणि निंदा करण्याचे लक्ष्य बनवून घेतात. किती तरी दुर्बल ईमानवाले आहेत की, ते या निंदेला भिऊन, अल्लाहच्या पुष्कळशा आदेशांवर अंमलबजावणी करण्याला टाळतात. जसे दाढी आहे, परद्याची समस्या आहे; लग्न समारंभाच्या गैरइस्लामी रितीरिवाजांपासून वांचणे आहे; वगैरे वगैरे. भाग्यवान आहेत ते लोक, जे कुठल्याही टवाळकी आणि निंदेची पर्वा करीत नाही. आणि अल्लाह व रसूलच्या आज्ञापालनापासून कधीही तोंड फिरवीत नाही. ''ला यखाफुना लवमता लाईम.'' अल्लाहतआला कयामतच्या दिवशी याचा त्यांना उत्कृष्ट बदला प्रदान करील. आणि त्यांना साफल्य बहाल करील. जसे की या महावाक्यांत स्पष्ट आहे. अल्लाहुम्मा जअलना मिनहुम. (आमीन) (हे अल्लाह आम्हाला त्यांच्यातून बनव)

قٰلَ كَمْ لَبِثْتُمْ فِي الْأَرْضِ عَدَدَ سِنِينَ ﴿١١٢﴾

**अल्लाहतआला त्यांना विचारेल की तुम्ही पृथ्वीत गणतीची किती वर्षे राहिला असाल? (११२)**

قَالُوا لَبِثْنَا يَوْمًا أَوْ بَعْضَ يَوْمٍ فَسْـَٔلِ الْعَادِّينَ ﴿١١٣﴾

**ते म्हणतील की एक दिवस, किंवा एक दिवसाहून पण कमी; जे मोजत राहिले असतील त्यांना सुद्धा विचारून घ्या[२] (११३)**

قٰلَ إِنْ لَبِثْتُمْ إِلَّا قَلِيلًا لَوْ أَنَّكُمْ كُنْتُمْ تَعْلَمُونَ ﴿١١٤﴾

**अल्लाहतआला म्हणेन, खरोखर तुम्ही तेथे, फारच थोडे राहिला आहांत; अरेरे! तुम्ही यांस पहिलेच जाणून घेते?[३] (११४)**

أَفَحَسِبْتُمْ أَنَّمَا خَلَقْنٰكُمْ عَبَثًا وَأَنَّكُمْ إِلَيْنَا لَا
تُرْجَعُونَ ﴿١١٥﴾

**का तुम्ही अशी कल्पना करीत होता की, आम्ही तुम्हास व्यर्थ निर्माण केले आहे; आणि हे की आमच्याकडे परतून आणलेच जाणार नाही (११५)**

فَتَعٰلَى اللّٰهُ الْمَلِكُ الْحَقُّ لَا إِلٰهَ إِلَّا هُوَ رَبُّ الْعَرْشِ
الْكَرِيمِ ﴿١١٦﴾

**अल्लाहतआला जो खरा बादशाह आहे तो मोठा थोर आहे;[४] त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. तो महासिंहासनाचा स्वामी आहे.[५] (११६)**

وَمَنْ يَدْعُ مَعَ اللّٰهِ إِلٰهًا آخَرَ لَا بُرْهَانَ لَهُ بِهِ فَإِنَّمَا
حِسَابُهُ عِنْدَ رَبِّهِ إِنَّهُ لَا يُفْلِحُ الْكٰفِرُونَ ﴿١١٧﴾

**जो मनुष्य अल्लाहच्या बरोबर, कोण्या दुसऱ्या उपास्याला बोलाविल, ज्याचे काही प्रमाण त्याच्याजवळ नाही; बस! मग त्याचा हिशेब त्याच्या पालनकर्त्यावरच आहे; नि:संशय काफिर लोक सफल होणार नाही.[१] (११७)**

وَقُلْ رَبِّ اغْفِرْ وَارْحَمْ وَأَنْتَ خَيْرُ الرّٰحِمِينَ ﴿١١٨﴾

**तू प्रार्थना करीत रहा की, हे माझ्या पालनकर्त्या ' तू क्षमा कर आणि दया कर, तू सर्व दयाकर्त्यांत उत्तम दयाकर्ता आहेस (११८)**

२) याच्याने अभिप्रेत देवदूत आहेत. जे माणसांची कर्मे आणि वये लिहण्यावर तैनात आहेत. किंवा ती माणसे अभिप्रेत आहेत, जे जमाखर्चात प्राविण्य बाळगतात. कयामतची भयानकता यांच्या डोक्यांतून, जगांतील सुखचैन मिटवून टाकेल. आणि जगांतले जीवन त्यांना असे वाटेल, जसा एक दिवस, किंवा अर्धा दिवस. म्हणून ते म्हणतील की, आम्ही तर एक दिवस किंवा त्यापेक्षासुद्धा कमी, जगांत राहिलो. तू देवदूत किंवा हिशेब ठेवणाऱ्यांना खुशाल विचारून घे!

३) याचा अर्थ हा आहे की, परलोकातील कायमचे जीवनाच्या मुकाबल्यांत, खचित्‌च जगांतील जीवन फारच अल्प आहे. परंतु या मुद्द्याला तुम्ही जगांत जाणले नाही. अरेरे! तुम्ही जगांत या वास्तवाला आणि जगाच्या क्षणभंगुर होण्यापासून, सावध होऊन गेले असते, तर आज पण ईमानवाल्यांप्रमाणे यशस्वी आणि सफल होऊन गेले असते.

४) म्हणजे तो याच्यापेक्षा जास्त थोर आहे की, तो तुम्हांस कोण्याही उद्देशाशिवाय, असाच, एक खेळ म्हणून, व्यर्थ निर्माण करील, आणि तुम्ही जे इच्छाल ते करावे, तुमच्याकडून याची काही विचारपूसच होऊं नये. किंबहुना त्याने तुम्हांस एका खास उद्देशा अंतर्गत निर्माण केले आहे. आणि ते आहे, त्याची भक्ती करणे. म्हणून पुढे सांगितले की तोच उपास्य आहे. त्याच्यावाचून अन्य कोणी उपास्य नाही.

५) महासिंहासनाचे कृपाळू वैशिष्टय सांगितले की, तेथून दया आणि बरकतींचे अवतरण होते.

१) याच्याने ठाऊक झाले की, सफलता आणि यशस्वी होणे, परलोकांत अल्लाहच्या शिक्षेपासून वांचून जाणे आहे. निव्वळ ऐहिक धनसंपत्ती आणि सुख चैनीची मुबलकता, यशस्वी होणे नाही. ही तर जगांत काफिरांना पण प्राप्त आहे. परंतु अल्लाहतआला याच्याने यशस्वी होण्याला कमी लेखीत आहे. ज्याचा स्पष्ट अर्थ हा आहे की, खरे साफल्य, परलोकांतील साफल्य आहे; जे ईमानवाल्यांच्या वाट्याला येईल. न की, जगांतील धन आणि संरजामांची विपुलता; जी भेदभावाशिवाय, ईमानवाले आणि काफिर, सर्वांना मिळत असते.

اٰيَاتُهَا ٦٤ (٢٤) سُوْرَةُ النُّوْرِ مَدَنِيَّةٌ (١٠٢) رُكُوْعَاتُهَا ٩

# (२४) सू. अलनूर

महावाक्ये ६४ | रुकूअ ९

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावानें मी आरंभ करतो

سُوۡرَةٌ اَنۡزَلۡنٰهَا وَفَرَضۡنٰهَا وَاَنۡزَلۡنَا فِيۡهَاۤ اٰيٰتٍۭ بَيِّنٰتٍ لَّعَلَّكُمۡ تَذَكَّرُوۡنَ ۝١

**हा आहे तो अध्याय, जो आम्ही अवतरित केला आहे; (१) आणि (कायदे) आम्हीच ठरविलेले आहेत, आणि ज्याच्यांत आम्ही स्पष्ट आदेश अवतरित केले आहेत; कारण की तुम्ही लक्षांत ठेवावे ①**

اَلزَّانِيَةُ وَالزَّانِىۡ فَاجۡلِدُوۡا كُلَّ وَاحِدٍ مِّنۡهُمَا مِائَةَ جَلۡدَةٍ‌ وَّلَا تَاۡخُذۡكُمۡ بِهِمَا رَاۡفَةٌ فِىۡ دِيۡنِ اللّٰهِ اِنۡ كُنۡتُمۡ تُؤۡمِنُوۡنَ بِاللّٰهِ وَالۡيَوۡمِ الۡاٰخِرِ‌ وَلۡيَشۡهَدۡ عَذَابَهُمَا طَآئِفَةٌ مِّنَ الۡمُؤۡمِنِيۡنَ ۝٢

**व्याभिचारी करणाऱ्या स्त्री आणि पुरूषातून, प्रत्येकाला शंभर कोडे मारा. (२) त्यांच्यावर, अल्लाहच्या हुकूमाच्या अंमलबजावणीत, तुम्हाला अजिबात कळवळा येता कामा नये; जर तुम्ही, अल्लाह आणि कयामतच्या दिवसावर विश्वास ठेवित असाल. (३) त्यांच्या शिक्षेच्या वेळी, मुसलमानांचा एक समूह उपस्थित असावयास हवा (४) ②**

✿ अध्याय नूर, अहजाब, आणि निसाअ, हे तिन्ही अध्याय असे आहेत, ज्यांत स्त्रियांच्या विशिष्ट समस्या, आणि सामाजिक जीवना बाबात, महत्त्वाचे तपशील सांगण्यांत आले आहेत.

१) कुरआन करीमचे सर्वच अध्याय, अल्लाहचे अवतीर्ण केलेले आहेत. परंतु या अध्यायाच्या बाबतीत जे हे सांगितले तर याच्याने, या अध्यायामध्ये सांगितलेल्या आदेशांचे महत्त्व सुस्पष्ट करणे आहे.

२) व्याभिचाराच्या सुरवातीच्या शिक्षेत, जी इस्लाममध्ये, तात्पुरती म्हणून सांगण्यात आली होती, ती सू.निसा आ.१५ मध्ये येऊन चुकली आहे. तिच्यांत सांगण्यांत आले होते की, याच्या करीता जोपर्यंत, नक्की शिक्षा निश्चित न करून दिली जाईल, त्या व्याभिचारिणी स्त्रीयांना घरांत कोंडून ठेवा. मग जेव्हा सू.नूर ची ही आयत अवतीर्ण झाली, तेव्हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले की, ''अल्लाहतआलाने जो वायदा केला होता, त्याच्याप्रमाणे व्याभिचारी पुरूष आणि स्त्रीची नक्की शिक्षा निश्चित करून देण्यांत आली आहे; ती तुम्ही माझ्याकडून शिकून घ्या. आणि ती आहे कुवाऱ्या (अविवाहीत) पुरूष आणि स्त्रीयांकरीता शंभर कोडे, आणि विवाहीत पुरूष आणि स्त्रीयांकरीता, शंभर शंभर कोडे, आणि धोंडमार करून मारून टाकणे. (स.मुस्लीम) मग आपण ﷺ विवाहीत व्याभिचाऱ्यांना कृतीने धोंडमाराची शिक्षा दिली. आणि शंभर कोडे (जी लहान शिक्षांआहे) मोठ्या शिक्षेत, विसर्जित करून टाकण्यांत आली. आता विवाहीत व्याभिचाऱ्यांसाठी, शिक्षांफक्त रजम म्हणजे धोंडमार आहे. पैगंबर ﷺ च्या काळानंतर, खुल्फा-ए-राशेदीन आणि सहाबांच्या काळी सुद्धां, हीच शिक्षांदेण्यांत आली; आणि नंतर उम्मतचे तमाम धर्मशास्त्री आणि धर्मपंडित, यालाच मान्यता देत राहिले. आणि आजपर्यंत मान्यता देत आहेत. फक्त खवारिज (म्हणजे ह.अली رضي الله عنه चे विरोधक) यांनी या शिक्षेचा इन्कार केला. आणि खवारिजनंतर, फराही पंथाचे ''इमाम सानी व सालिस'' ''साहिबे तदब्बरुल कुरआन'' आणि जावीद अहमद गामदी ने या शिक्षेचा इन्कार केला आहे. आणि हदीशीला नाकारणाऱ्यांनी सुद्धा याला नाकारले आहे. या नाकारण्याचे मूळ कारण पण तेच हदीशीला नाकारणे आहे. कारण की धोंडमाराची शिक्षा खऱ्या आणि फारच मजबुत अशा हदीशींनी सिद्ध आहे; आणि त्यांची रिवायत करणारे, पण एवढ्या मोठ्या संख्येत आहेत की, धर्मपंडितांनी याला क्रमश: रिवायतीत शामील केले आहे. म्हणून हदीसीला मानणारा आणि धर्मांमध्ये, शास्त्राने विहीत असल्याचे मान्य असणारा मनुष्य, धोंडमाराला नाकारूंशकत नाही. (तपशीला करता पहावे लेखकाचे पुस्तक, ''हद्दे रजमकी शरअी हैशिअत और मुगालेतात, शुबहात का इजाला'')

३) याचा अर्थ हा आहे की, कळवळा येऊन, शिक्षा देण्याला टाळू नका. नाहीतर स्वाभाविकरित्या कळवळा येणे, ईमानाच्या विरूद्ध नाही. थोडक्यांत, मानवाच्या खास स्वभाव वैशिष्ट्यांतून आहे.

४) कारण की शिक्षेचा मूळ उद्देश्य, लोकांनी यापासून धडा घ्यावा. जास्त मोठ्या प्रमाणावर हे साध्य व्हावे. दुर्दैवाने आजकाल, सार्वजनिकरित्या, शिक्षा देण्याला मानवी अधिकारांच्या विरूद्ध ठरविण्यांत येत आहे. हे निव्वळ अज्ञान, अल्लाहच्या आदेशांच्या प्रति बंडखोरी आणि आपलेपणाची भावना, अल्लाहपेक्षा सुद्धा जास्त, माणसांशी सहानुभूती बाळगणारा, आणि हितचिंतक, बनने आहे. वास्तविक अल्लाहपेक्षा जास्त कनवाळू आणि दयाळू कोणी नाही.

الزَّانِي لَا يَنكِحُ إِلَّا زَانِيَةً أَوْ مُشْرِكَةً وَالزَّانِيَةُ لَا يَنكِحُهَا إِلَّا زَانٍ أَوْ مُشْرِكٌ ۚ وَحُرِّمَ ذَٰلِكَ عَلَى الْمُؤْمِنِينَ ﴿٣﴾

**व्याभिचार पुरूष, व्याभिचारिणी किंवा मुशरिक स्त्रीयांशीही लग्न करतात आणि व्याभिचारिणी स्त्री सुद्धा, व्याभिचारी किंवा मुशरिक पुरूषाशी लग्न करतात. आणि ईमानवाल्यांवर हे हराम करून देण्यांत आले आहे[१] ③**

وَالَّذِينَ يَرْمُونَ الْمُحْصَنَاتِ ثُمَّ لَمْ يَأْتُوا بِأَرْبَعَةِ شُهَدَاءَ فَاجْلِدُوهُمْ ثَمَانِينَ جَلْدَةً وَلَا تَقْبَلُوا لَهُمْ شَهَادَةً أَبَدًا ۚ وَأُولَٰئِكَ هُمُ الْفَاسِقُونَ ﴿٤﴾

**आणि जे लोक सदाचरणी स्त्रियांवर व्याभिचाराचा आळ घेतील, मग चार साक्षीदार सादर करू शकणार नाहीत, तर त्यांना ऐंशी कोडे मारा; आणि कधीही त्यांची साक्ष मान्य करू नका; आणि हे दुराचारी लोक आहेत[२] ④**

إِلَّا الَّذِينَ تَابُوا مِن بَعْدِ ذَٰلِكَ وَأَصْلَحُوا فَإِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿٥﴾

**होय! परंतु जे लोक, याच्यानंतर पश्चात्ताप व्यक्त करतील, आणि (आपल्यात) सुधारणा करतील, [३] तर अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे ⑤**

१) याच्या भावार्थांत भाष्यकारांमध्ये मतभेद आहेत. काही म्हणतात की, येथे निकाहने अभिप्रेत नेहमीचा निकाह नाही. किंबहुना हे समागमाच्या अर्थांत आहे. आणि उद्देश्य व्याभिचाराचा घाणेरडापणा आणि वाईटपणा वर्णन करणे आहे. अर्थ हा आहे की, कुकर्म करणारा मनुष्य, आपल्या कामवासनेचे अयोग्यरित्या समाधान करण्यासाठी, कुकर्म करणाऱ्या स्त्रीकडे, आणि अशाच प्रकारे, कुकर्म करणारी स्त्री, कुकर्म करणाऱ्या पुरूषाकडे वळते-ईमानवाल्यांसाठी असे करणे, म्हणजे व्याभिचार हराम आहे. आणि मुश्रिक पुरूष आणि स्त्रीचा उल्लेख, यासाठी केला की, शिर्कपण, व्याभिचाराशी मिळते जुळते पाप आहे. ज्याप्रमाणे मुश्रिक अल्लाहला सोडून, दुसऱ्यांच्या द्वारांवर वांकतो, त्याच प्रमाणे एक व्याभिचारी, आपल्या पत्नीला सोडून, किंवा पत्नी आपल्या पतीला सोडून, दुसऱ्याशी आपले तोंड काळे करते. अशा प्रकारे मुश्रिक आणि व्याभिचाऱ्याच्या दर्म्यान, एक विचित्र अर्थाच्या दृष्टीने, साम्य आढळून येते. काही म्हणतात की, हे प्रबळ अहवालाच्या अनुषंगाने आहे; आणि अर्थ हा आहे की, सर्व साधारणपणे कुकर्म करणारे लोक, लग्नाकरीतांआपल्याच सारख्या लोकांकडे वळतात. म्हणून व्याभिचाऱ्यांची बहुतायता, व्याभिचाऱ्यांबरोबरच लग्न करणे पसंत करते. आणि उद्देश्य याच्याने, ईमानवाल्यांना सावधान करणे आहे; की ज्याप्रमाणे व्याभिचार एक फारच घाणेरडा आणि वाईट अपराध आहे. अशाच प्रकारे व्याभिचाऱ्यांबरोबर लग्नसंबंध जोडणे पण, मना आणि हराम आहे. इमाम शौकानीने या भावार्थाला योग्य म्हटले आहे. आणि हदीशींमध्ये याच्या प्रकटीकरणाची जी कारणे सांगितली आहेत; यांच्याने पण याचे समर्थन होते की, काही सहाबांनी ﷺ कुकर्म करणाऱ्या स्त्रीयांशी, लग्न करण्याची परवानगी मागितली, ज्यावर हे महावाक्य प्रकट झाले. म्हणजे त्यांना असे करण्यापासून मना करण्यात आले. याचा आधार घेत धर्मपंडीतांनी म्हटले आहे की, एका मनुष्याने ज्या स्त्रीशी, किंवा स्त्रीने ज्या पुरूषाशी, कुकृत्ये केले असेल, त्याचे आपसातील लग्न योग्य नाही. होय! परंतु ते खरी तौबा करून घेतील, तर मग त्यांच्या दर्म्यान लग्न योग्य आहे. (तफसीर इब्ने कसीर.)

२) याच्यात कजफ (म्हणजे खोटा आळ) घेण्याची शिक्षा सांगण्यांत आली आहे. की, जो मनुष्य कोण्या सदाचरणी स्त्री आणि पुरूषांवर, व्याभिचाराचा आळ घेईल, (अशाच प्रकारे जी स्त्री कोण्या सदाचरणी पुरूषावर किंवा स्त्रीवर, व्याभिचाराचा आळ घेईल.) आणि तो पुरावा म्हणून चार साक्षीदार हजर न करू शकेल, तर त्याच्या करीता तीन आदेश देण्यात आले आहेत. (१) त्यांना ऐंशी कोडे मारण्यांत यावे (२) त्यांची साक्षी कधी ग्राह्य न धरली जावी. (३) तो अल्लाहजवळ, दुराचारी आहे.

३) तौबा केल्याने, कोड्यांची शिक्षा माफ होणार नाही, तो तौबा करणारा होऊन जावा, किंवा हटधर्मी व्हावे, ही शिक्षांतर केव्हाही मिळणारच. तथापि दुसऱ्या दोन गोष्टी ज्या आहेत, साक्ष ग्राह्य न घेणे व दुराचरणी गणले जाणे; याच्यांत मतभेद आहेत. काही धर्मपंडित याला दुराचरणापर्यंत मर्यादित ठेवतात. म्हणजे तौबा केल्यानंतर तो दुराचरणी राहणार नाही. आणि काही भाष्यकार, दोन्ही वाक्यांना यांत शामील समजतात, म्हणजे तौबा केल्यानंतर, त्याची साक्ष पण ग्राह्य धरली जाईल. इमाम शौकानीने याच दुसऱ्या मताला, प्राधान्य दिले आहे; आणि 'अबदन' चा अर्थ सांगितला आहे, जो पर्यंत तो आळ घेत राहील. ज्याप्रमाणे म्हटले जावे की काफिरची साक्ष कधी ग्राह्य धरली नाही. तर येथे 'कधी' चा अर्थ हाच होईल की जोपर्यंत तो काफीर राहील.

وَالَّذِيْنَ يَرْمُوْنَ اَزْوَاجَهُمْ وَلَمْ يَكُنْ لَّهُمْ شُهَدَآءُ اِلَّآ اَنْفُسُهُمْ فَشَهَادَةُ اَحَدِهِمْ اَرْبَعُ شَهٰدٰتٍۢ بِاللّٰهِ ۙ اِنَّهٗ لَمِنَ الصّٰدِقِيْنَ ۝٦

**आणि जे लोक आपल्या पत्नींवर व्याभिचाराचा दोष लावतील, आणि त्यांचा कोणी साक्षीदार, खुद्द त्यांच्याशिवाय नसेल तर अशा लोकांमधून प्रत्येकाचा पुरावा हा आहे की, चारवेळा अल्लाहची शपथ खाऊन म्हणावे की, तो खऱ्यांमधून आहे. ६**

وَالْخَامِسَةُ اَنَّ لَعْنَتَ اللّٰهِ عَلَيْهِ اِنْ كَانَ مِنَ الْكٰذِبِيْنَ ۝٧

**आणि पांचव्या वेळी म्हणावे की, त्याच्यावर अल्लाहचा शाप होवो, जर ते खोट्यांमधून असतील(१) ७**

وَيَدْرَؤُا عَنْهَا الْعَذَابَ اَنْ تَشْهَدَ اَرْبَعَ شَهٰدٰتٍۢ بِاللّٰهِ ۙ اِنَّهٗ لَمِنَ الْكٰذِبِيْنَ ۝٨

**आणि स्त्रीयाकडून शिक्षा अशाप्रकारे दूर होऊ शकते की, तिने चार वेळांअल्लाहची शपथ खाऊन म्हणावे की, खचित्‌च तिचा पती खोटे बोलणाऱ्यांमधून आहे. ८**

وَالْخَامِسَةَ اَنَّ غَضَبَ اللّٰهِ عَلَيْهَآ اِنْ كَانَ مِنَ الصّٰدِقِيْنَ ۝٩

**आणि पांचव्या वेळी म्हणावे की, तिच्यावर अल्लाहचा प्रकोप होवो, जर तिचा पती खऱ्यांमधून असेल(२) ९**

وَلَوْلَا فَضْلُ اللّٰهِ عَلَيْكُمْ وَرَحْمَتُهٗ وَاَنَّ اللّٰهَ تَوَّابٌ حَكِيْمٌ ۝١٠

**आणि जर अल्लाहतआलाची दया आणि कृपा तुमच्यावर नसती, (३) (तर तुमची अडचण झाली असती) आणि अल्लाहतआला पश्चात्ताप मान्य करणारा आणि जाणणारा आहे. १०**

اِنَّ الَّذِيْنَ جَآءُوْ بِالْاِفْكِ عُصْبَةٌ مِّنْكُمْ ۭ لَا تَحْسَبُوْهُ شَرًّا لَّكُمْ ۭ بَلْ هُوَ خَيْرٌ لَّكُمْ ۭ لِكُلِّ امْرِئٍ مِّنْهُمْ مَّا اكْتَسَبَ مِنَ الْاِثْمِ ۚ وَالَّذِيْ تَوَلّٰى كِبْرَهٗ مِنْهُمْ لَهٗ عَذَابٌ عَظِيْمٌ ۝١١

**नि:संशय ज्या लोकांनी हा फार मोठा आळ घेतलेला आहे, (४) हा पण तुमच्यातूनच एक समूह आहे. (५) तुम्ही त्याला आपल्यासाठी वाईट समजू नका; किंबहुना हे तर तुमच्यासाठी उत्तम आहे; (६) हां! त्यांच्यातून प्रत्येक माणसावर,तेवढे पाप आहे जेवढे त्याने कमविले आहे; आणि त्यांच्यातून ज्याने याच्यातूंन मोठा वाटा घेतला, त्याच्यासाठी शिक्षा पण फार मोठी आहे. (७) ११**

لَوْلَآ اِذْ سَمِعْتُمُوْهُ ظَنَّ الْمُؤْمِنُوْنَ وَالْمُؤْمِنٰتُ بِاَنْفُسِهِمْ خَيْرًا ۙ وَّقَالُوْا هٰذَآ اِفْكٌ مُّبِيْنٌ ۝١٢

**त्याला ऐकताच ईमानवाल्या पुरूषांनी व स्त्रीयांनी आपल्या संबंधात, चांगली कल्पना का केली नाही? आणि का सांगून टाकले नाही की, हा तर उघड उघड निखालस आहे. (८) १२**

لَوْلَا جَآءُوْ عَلَيْهِ بِاَرْبَعَةِ شُهَدَآءَ ۚ فَاِذْ لَمْ يَاْتُوْا بِالشُّهَدَآءِ فَاُولٰۗىِٕكَ عِنْدَ اللّٰهِ هُمُ الْكٰذِبُوْنَ ۝١٣

**ते याच्यावर चार साक्षीदार कांआणले नाहीत? आणि जेव्हा साक्षीदार आणले नाहीत, तर हे आळ घेणारे लोक, खचित्‌च अल्लाहच्याजवळ निव्वळ खोटे आहेत १३**

وَلَوْلَا فَضْلُ اللّٰهِ عَلَيْكُمْ وَرَحْمَتُهٗ فِي الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ لَمَسَّكُمْ فِيْ مَآ اَفَضْتُمْ فِيْهِ عَذَابٌ عَظِيْمٌ ۝١٤

**आणि जर अल्लाहतआलाची दया आणि कृपा, तुमच्यावर इहलोकांत आणि परलोकांत नसती, तर खचित्‌च तुम्ही ज्या गोष्टीची चर्चा, सुरू करून ठेवली होती, या बाबतीत तुम्हाला फार मोठी शिक्षा मिळाली असती. १४**

१) याच्यांत 'लिआन' ची समस्या सांगण्यात आली आहे. ज्याचा अर्थ हा आहे की, कोण्या पुरूषाने आपल्या पत्नीला, आपल्या डोळ्यांनी, कोण्या परपुरूषाबरोबर, कुकृत्य करतांना पाहिले, ज्याचा तो प्रत्यक्षदर्शी साक्षी आहे; परंतु व्याभिचाराच्या शिक्षेसाठी, सिद्ध करण्यासाठी, चार पुरूषांची प्रत्यक्षदर्शी साक्ष आवश्यक आहे. म्हणून जोपर्यंत तो आपल्याबरोबर आणखी तीन प्रत्यक्षदर्शी साक्षी हजर करणार नाही, त्याच्या पत्नीवर व्याभिचाराची शिक्षा लागू होऊ शकत नाही. परंतु आपल्या डोळ्यांनी पाहून घेतल्यानंतर, अशा वाईटमार्गी स्त्रीला सहन करणे पण त्याच्यासाठी अशक्य आहे. धर्मशास्त्राने त्याचा उपाय हा पुढे केला आहे की, हा मनुष्य न्यायालयांत, किंवा योग्य अधिकाऱ्यापुढे, चार वेळा अल्लाहची शपथ खाऊन, म्हणेल की, तो आपल्या पत्नीवर व्याभिचाराचा दोष लावण्यांत खरा आहे. किंवा हे मूल किंवा गर्भ त्याचा नाही. आणि पाचव्या वेळेला म्हणेल की जर तो खोटा आहे तर त्याच्यावर अल्लाहचा शाप !

२) म्हणजे जर पतीच्या उत्तरांत, पत्नी चार वेळा शपथ खाऊन, हे सांगून देईल की तो खोटा आहे; आणि पांचव्या वेळेस सांगेन की, जर तिचा पती खरा आहे (आणि मी खोटी आहे) तर माझ्यावर अल्लाहचा पक्रोप होवो ! तर अशा

स्वरूपांत ती व्याभिचाऱ्याच्या शिक्षेपासून वांचून जाईल. याच्यानंतर त्या दोघांमध्ये, नेहमीसाठी वेगळे होणे, होऊन जाईल. याला 'लिआन' यासाठी म्हणतात की, याच्यांत दोघेपण, आपल्या स्वत:ला खोटे होण्यामुळे शापास योग्य ठरवितात. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या काळांत, अशा काही घटना पुढे आल्यांत, ज्यांचा तपशिल हदींशिंमध्ये आढळून येतो. त्याच घटना या महावाक्याच्या अवतरणाला कारणीभूत ठरल्यांत.
३) याचे उत्तर महजुफ आहे. तर तुमच्यातून खोट्यांवर लगेच अल्लाहतआलाची शिक्षांअवतरीत झाली असती; परंतु, कारण की तो तौबा कबूल करणारा आणि जाणणारा पण आहे, म्हणून त्याने एक तर त्यांचे दोष झांकून टाकले; कारण की, याच्यानंतर जर कोणी, खऱ्या मनाने तौबा करेल, तो त्याला आपल्या दयेच्या छत्राखाली घेऊन घेईल. आणि जाणकारपण आहे की, त्याने लिआन सारखी समस्या सांगून फार लाज बाळगणाऱ्या (गयुर) पुरूषांसाठी एक फारच परिपूर्ण आणि सोपा उपाय उपलब्ध करून दिला आहे.
४) इफ्क् ने अभिप्रेत, ती घटना आहे, जिच्यांत दांभिकांनी ह.आयेशा सिद्दीका ﵂ च्या निष्कलंक आणि स्वच्छ चारित्र्यावर शिंतोडे उडविण्याचे ठरविले होते. परंतु अल्लाहतआलाने कुरआन करीममध्ये, ह.आयेशा ﵂ चे निर्दोषत्व प्रकट करून, त्यांच्या स्वच्छ चारित्र्याला आणि शील संरक्षणाला स्पष्ट करून टाकले. संक्षिप्तपणे ही घटना अशी आहे की, पडद्याच्या आदेशानंतर, बनी अल् मस्तलक (मरैसीअ) च्या युद्धाहून परत येत असतांना, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि सहाबा करामने, मदीने जवळ एका जागी मुक्काम केला. सकाळी जेव्हा तेथून रवाना झालेत; तेव्हा ह. आयेशाचा हौदज सुद्धा, जो रिकामा होता, काफिल्यांनी हे समजून उंटावर वर ठेवून दिला. की, उम्मूल मोमिनीन त्याच्या आंतच असवील आणि तेथून रवाना होऊन गेलेत. वास्तविक ह.आयेशा आपल्या हाराच्या शोधात, बाहेर गेली होती. जेव्हा त्या परत आल्या, तेव्हा पाहिले की काफला निघून गेला आहे. तर असा विचार करून तेथेच झोपून गेल्या की, जेव्हा त्यांना माझ्या उपस्थित नसण्याचे ज्ञान होईल, तर शोधांकरीता परत येथेच येतील. थोड्या वेळानंतर, सफ्वान बिन मुअत्तल सलमी येऊन पोहचले. ज्यांची जबाबदारी हीच होती की, काफल्याच्या राहून गेलेल्या वस्तू त्यांनी साभांळून घ्याव्या. त्यांनी ह. आयशाला पडद्याच्या हुकुमापूर्वी पाहिलेले होते. त्यांनी पाहतांच इन्नालिल्लाहे व .... म्हटले; आणि समजून गेले की, काफला, चुकीने किंवा अज्ञानाने, ह.उम्मुल मोमिनीनला येथेच सोडून पुढे चालला गेला आहे. म्हणून त्यांनी, त्यांना उंटावर बसविले; आणि स्वत: उंटाची लगाम धरून, पायी चालत, काफल्याला जाऊन मिळाले. दांभिकांनी जेव्हा ह. आयेशा ﵂ ला, अशाप्रकारे नंतर, एकटे, ह.सफवान बरोबर येतांना पाहिले, तर या संधीचा फायदा उचलत, दांभिकांचा सरदार, अब्दुल्लाह बिन उबई ने म्हटले की हा एकांत, आणि वेगळेपण काही कारणांवांचून नाही; आणि अशाप्रकारे त्यांनी, ह.आयेशा ﵂ ला ह.सफवान बरोबर, दोषारोपण केले. वास्तविक दोन्ही, या गोष्टीकडून अनभिज्ञ होते. काही सच्चे मुसलमानपण, दांभिकांच्या या अपप्रचाराला बळी पडले. उदा.ह.हस्सान, मिस्तअ बिन असासा, आणि हमना बिन्ते जहश ﵃ (या घटनेचा पूर्ण तपशिल, सहीह हदीर्शींमध्ये आढळून येतो.) नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, पूर्ण एक महिन्यापर्यंत, जोपर्यंत की अल्लाहतआलाकडून निर्दोषत्व प्रकट झाले नाही, फारच परेशान राहिलेत. आणि ह.आयेशा ﵂ अज्ञानामुळे आपल्या ठायी बैचेन आणि व्याकुळ राहिल्यांत. या महावाक्यांत अल्लाहतआलाने याच घटनेला थोडक्यांत परंतु अर्थपूर्ण रित्या, सांगितले आहे. 'इफ्क' चा अर्थ आहे, कोण्या गोष्टीला उलटवून टाकणे. या घटनेत सुद्धां, दांभिकांनी प्रकरणाला उलटवून टाकले होते. म्हणजे ह.आयशा ﵂ तर गौरव आणि प्रसंशेला पात्र होती, उच्च घराण्याची, आणि उच्च कर्तृत्वाची स्वामिनी होती, न की खोटी. परंतु त्या जालिमांनी त्या शिलवान स्त्रीला, उलट ताणे देणे आणि आळ घेण्याचा निशाणा बनवून घेतले.
५) एका गटाला आणि समूहाला 'उसबा' म्हटले जाते; कारण की ते एक दुसऱ्याचा आधार आणि पक्ष घेण्याला कारणीभूत होतात.
६) कारण की, त्याच्यामुळे आम्हांस एक तर, दु:खामुळे मोठे प्रतिफळ मिळेल; दुसरे आकाशांतून, ह.आयेशा ﵂ च्या निर्दोषत्वामुळे, त्यांची मोठी शान आणि त्यांच्या घराण्याची प्रतिष्ठा आणि महानता ठळकपणे दिसून आले. याशिवाय ईमानवाल्यांसाठी, याच्यांत धडा घेणे, आणि उपदेश ग्रहण करणे आहे. आणि कित्येक बाजू आहेत.
७) याच्याने अभिप्रेत, अब्दुल्लाह बिन उबई हा दांभिक आहे; जो या कारस्थानांचा सुत्रधार होता.
८) येथून आचार विचारांच्या त्या बाजूंना विषद करण्यांत येत आहे; जे या घटनेत गुप्त आहेत. यांत सर्वांत पहिली गोष्ट ही आहे की, ईमानवाले एका जिवासारखे आहेत. जेव्हांह.आयेशा ﵂ वर आळ घेण्यांत आला, तर तुम्ही आपल्याशीच अंदाज बांधून, लगेच त्याचे का खंडन केले नाही ? आणि त्याला निखालस खोटा आळ म्हणून का जाहीर केले नाही?

إِذْ تَلَقَّوْنَهُۥ بِأَلْسِنَتِكُمْ وَتَقُولُونَ بِأَفْوَاهِكُم مَّا لَيْسَ لَكُم بِهِۦ عِلْمٌ وَتَحْسَبُونَهُۥ هَيِّنًا وَهُوَ عِندَ ٱللَّهِ عَظِيمٌ ﴿١٥﴾

जेव्हा की तुम्ही आपल्या जिभांनी तिची चर्चा करू लागला, आणि आपल्या तोंडानी अशा गोष्टी बोलू लागला, ज्याचे तुम्हास अजिबात काहीच ज्ञान नव्हते आणि तुम्ही तिला एक हलकीशी गोष्ट समजत राहिला; परंतु अल्लाहतआला जवळ, ती एक फार मोठी गोष्ट होती. (१५)

وَلَوْلَآ إِذْ سَمِعْتُمُوهُ قُلْتُم مَّا يَكُونُ لَنَآ أَن نَّتَكَلَّمَ بِهَٰذَا سُبْحَٰنَكَ هَٰذَا بُهْتَٰنٌ عَظِيمٌ ﴿١٦﴾

आणि तुम्ही अशी गोष्ट ऐकून का नाही सांगितले की, आम्हाला अशी गोष्ट तोंडातून काढणे ही योग्य नाही. हे अल्लाह! तू पवित्र आहेस! हा तर फार मोठा आळ आणि दोषारोपण आहे[१] (१६)

يَعِظُكُمُ ٱللَّهُ أَن تَعُودُوا۟ لِمِثْلِهِۦٓ أَبَدًا إِن كُنتُم مُّؤْمِنِينَ ﴿١٧﴾

अल्लाहतआला तुम्हास उपदेश करतो की तुम्ही पुन्हा कधी असे काम करू नये; जर तुम्ही खरे ईमानदार आहात (१७)

وَيُبَيِّنُ ٱللَّهُ لَكُمُ ٱلْءَايَٰتِ وَٱللَّهُ عَلِيمٌ حَكِيمٌ ﴿١٨﴾

आणि अल्लाहतआला तुमच्या समोर आपली महावाक्ये (स्पष्ट करून) सांगत आहे. आणि अल्लाहतआला ज्ञाता आणि बुद्धीमान आहे. (१८)

إِنَّ ٱلَّذِينَ يُحِبُّونَ أَن تَشِيعَ ٱلْفَٰحِشَةُ فِى ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ لَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ فِى ٱلدُّنْيَا وَٱلْءَاخِرَةِ وَٱللَّهُ يَعْلَمُ وَأَنتُمْ لَا تَعْلَمُونَ ﴿١٩﴾

नि:संशय जे लोक मुसलमानांमध्ये वाईट गोष्ट पसरविण्याचे इच्छुक असतात, त्यांच्यासाठी इहलोकात आणि परलोकांत यातनादायक शिक्षा आहे.[२] अल्लाह सर्व काही जाणतो, आणि तुम्ही काहीच जाणत नाही (१९)

وَلَوْلَا فَضْلُ ٱللَّهِ عَلَيْكُمْ وَرَحْمَتُهُۥ وَأَنَّ ٱللَّهَ رَءُوفٌ رَّحِيمٌ ﴿٢٠﴾

आणि जर (अशी गोष्ट नसती की) तुमच्यावर अल्लाहची कृपा आणि दया नसती, आणि हे पण की, अल्लाहतआला फारच करूणाशील आणि दयाळू आहे[३] (२०)

يَٰٓأَيُّهَا ٱلَّذِينَ ءَامَنُوا۟ لَا تَتَّبِعُوا۟ خُطُوَٰتِ ٱلشَّيْطَٰنِ وَمَن يَتَّبِعْ خُطُوَٰتِ ٱلشَّيْطَٰنِ فَإِنَّهُۥ يَأْمُرُ بِٱلْفَحْشَآءِ وَٱلْمُنكَرِ وَلَوْلَا فَضْلُ ٱللَّهِ عَلَيْكُمْ وَرَحْمَتُهُۥ مَا زَكَىٰ مِنكُم مِّنْ أَحَدٍ أَبَدًا وَلَٰكِنَّ ٱللَّهَ يُزَكِّى مَن يَشَآءُ وَٱللَّهُ سَمِيعٌ عَلِيمٌ ﴿٢١﴾

अहो ईमानवाल्यांनो! शैतानाच्या पावलावर पाऊल ठेवून चालू नका; जो मनुष्य शैतानाच्या पावलांचे अनुकरण करेल, तर तो तर, निर्लज्जपणा आणि वाईट कामांचाच आदेश देईन. आणि जर अल्लाहतआलाची कृपा आणि दया तुमच्यावर नसती, तर तुमच्यातून कोणीही कधीसुद्धा पाकसाफ झाला नसता; परंतु अल्लाहतआला ज्याला पवित्र करू इच्छेल, त्याला (पवित्र) करून टाकतो.[४] आणि अल्लाह सर्व ऐकणारा आणि सर्व जाणणारा आहे. (२१)

وَلَا يَأْتَلِ أُو۟لُوا۟ ٱلْفَضْلِ مِنكُمْ وَٱلسَّعَةِ أَن يُؤْتُوٓا۟ أُو۟لِى ٱلْقُرْبَىٰ وَٱلْمَسَٰكِينَ وَٱلْمُهَٰجِرِينَ فِى سَبِيلِ ٱللَّهِ وَلْيَعْفُوا۟ وَلْيَصْفَحُوٓا۟ أَلَا تُحِبُّونَ أَن يَغْفِرَ ٱللَّهُ لَكُمْ وَٱللَّهُ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿٢٢﴾

तुमच्यातून जे लोक सर्वसुखसंपन्न आहेत, त्यांनी आपल्या नातेवाईकांना, आणि गरीब मोहतादांना, आणि हिजरत करणाऱ्यांना, अल्लाहच्या मार्गांत, न देण्याची शपथ न खाल्ली पाहिजे. किंबहुना क्षमा केली पाहिजे आणि सोडून दिले पाहिजे. काय तुम्ही इच्छित नाही, की अल्लाहतआलाने तुमचे अपराध क्षमा करून टाकावे?[५] आणि अल्लाह अपराधांना क्षमा करणारा आणि दयाळू आहे (२२)

१) दुसरी गोष्ट अल्लाहतआलाने ईमानवाल्यांना ही सांगितली की, या दोषारोपणावर त्यांनी एक साक्षीदारपण सादर केला नाही; जेव्हांकी याच्यासाठी चार साक्षीदार आवश्यक होते. असे असून सुद्धा तुम्ही या आळ घेणाऱ्यांना खोटे म्हटले नाही. हेच कारण आहे की, या महावाक्यांच्या प्रकटीकरणानंतर, ह. हस्सान, मिसतआ आणि हमना बिन्ते जहश, यांना खोट्यांची शिक्षा देण्यांत आली. (मुसनद अहमद जि.६ पृ.२५६७) अब्दुल्लाह बिन उबई याला शिक्षा यासाठी देण्यांत आली नाही की, त्याच्यासाठी परलोकातील मोठी शिक्षाच पुरेशी समजण्यांत आली. आणि ईमानवाल्यांना शिक्षा देऊन, या जगांतच पवित्र करून टाकले गेले. दुसरे, याच्या मागे एक संपूर्ण समूह होता. त्याला शिक्षा देण्यांत असे काही धोके होते की, ज्यांच्यापासून निपटणे, या वेळी मुसलमानांसाठी कठीण होते. म्हणून दूरदृष्टीने त्याला शिक्षा देणे टाळण्यांत आले. (फत्हुल कदीर)

तिसरी गोष्ट ही सांगण्यांत आली की, अल्लाहची कृपा आणि उपकार तुमच्यावर नसते, तर तुमची ही वर्तणूक तुम्ही कोणतीही चौकशी केल्याशिवाय, या अफवेला पुढे पसरविणे सुरू करून दिले, मोठ्या शिक्षेला कारणीभूत होती. याचा अर्थ हा आहे की, अफवा घडविणे आणि तिचा प्रचार आणि जाहिरात करणे पण मोठा अपराध आहे, ज्यावर मनुष्य

मोठ्या शिक्षेला पात्र ठरविला जाऊ शकतो.

चवथी बात ही की मामला सरळ सरळ पैगंबराच्या पवित्र पत्न्यांची पावित्र्याचा आणि त्यांच्या इज्जत आबरूचा होता. परंतु तुम्ही त्याला खरे पाहता महत्त्व दिले नाही. आणि त्याला हलके लेखले. याच्याने सुद्धा हे समजणे, उद्देश्य आहे की, निव्वळ कोणाची आबरू घेणेच गुनाह नाही की ज्याची शिक्षा शंभर कोडे किंवा धोंडमार करणे आहे; किंबहुना कोणाच्या इज्जत आणि आबरूवर अशा प्रकारे हल्ला करणे आणि कोण्या सद्चरित्र घराण्याची मानहानी आणि त्याला कमी लेखणे याचा प्रयत्न करणे पण अल्लाहच्याजवळ, फार मोठा अपराध आहे. याला हलके समजू नका. याचसाठी पुढे आणखी ताकीद करीत म्हटले की, तुम्ही ऐकताच, हे का म्हटले नाही की, आम्हांस अशी गोष्ट तोंडातून काढणे पण योग्य नाही. हा खचित्च मोठा आळ आहे. म्हणून इमाम मालिक म्हणतात, की जो नावापुरता मुसलमान, ह.आयेशा ﵂ वर निर्लज्जपणाचा आरोप करतो, तो काफिर आहे; कारण की, तो अल्लाह आणि कुरआनाला खोटे ठरवितो. (अयसरुत तफासीर)

२) 'फाहिशतुन' चा अर्थ निर्लज्जपणाचा आहे. आणि कुरआनाने कुकर्माला सुद्धा फाहिशतुन ठरविले आहे. (सू. बनी इस्राईल ३२) आणि तेथे कुकर्माच्या एका खोट्या बातमीच्या प्रसिद्धीला, पण अल्लाहतआलाने निर्लज्जपणाने संबोधित केले आहे. आणि त्याला इहलोकांत आणि परलोकांत, मोठ्या शिक्षेला कारणीभूत ठरविले आहे. ज्यामुळे निर्लज्जपणाच्या बाबतीत, इस्लामच्या दृष्टीकोनाचा आणि अल्लाहतआलाच्या इच्छेचा अंदाज येतो की, निव्वळ निर्लज्जपणाच्या एका खोट्या बातमीच्या प्रसिद्धीला, अल्लाहजवळ इतका मोठा अपराध आहे; तर जे लोक रात्रंदिवस, एका मुसलमान समाजांत, वर्तमान पत्रे, रेडिओ, टी.व्ही. आणि फिल्मा, नाटके यांच्यामार्फत निर्लज्जपणा पसरवित आहे; आणि घराघरांत त्यांना पोहचवित आहेत, अल्लाहच्या जवळ हे लोक किती मोठे अपराधी ठरतील? आणि या संस्थानमध्ये काम करणारे नौकर, का म्हणून, निर्लज्जपणाच्या प्रसिद्धीचे अपराधापासून जबाबदारी मुक्त होतील? अशाचप्रकारे आपल्या घरांत टी.व्हीं. आणून ठेवणारे, ज्यामुळे त्यांच्या येणाऱ्या वंशात निर्लज्जपणा पसरत आहे, ते पण निर्लज्जपणाला प्रसिद्धी देणारे म्हणून अपराधी का होणार नाहीत? आणि हाच मामला दैनिक वर्तमान पत्रांचा आहे की, त्यांचेपण घरांत येणे, निर्लज्जपणाच्या प्रसिद्धीला कारण आहे. हा पण अल्लाहजवळ अपराध होऊं शकतो. अरेरे! मुसलमान आपल्या या जबाबदारीचे भान ठेवेल तर किती चांगले होईल!! आणि या निर्लज्जपणाच्या वादळाला थांबविण्यासाठी, आपल्या यथाशक्ती प्रयत्न करेल, तर किती चांगले होईल!!!

३) उत्तर महजूफ आहे, तर मग अल्लाहची शिक्षा तुम्हांस आपल्या पकडीत घेऊन घेती. ही निव्वळ त्याची कृपा, आणि त्याची करूणाशिलता, आणि दया आहे की, त्याने या तुमच्या मोठ्या अपराधाला क्षमा करून टाकले.

४) या ठिकाणी शैतानाच्या अनुकरणाची मनाई केल्यानंतर, सांगितले की जर, अल्लाहची दया आणि कृपा नसती, तर तुमच्यातून कोणी सुद्धा पाकसाफ झाला नसता. याच्याने असा उद्देश्य वाटतो की, जे लोक, चर्चित आळ घेण्याच्या घटनेत लिप्त होण्यापासून वांचून गेले, ही निव्वळ अल्लाहची कृपा आणि दया आहे, जी त्यांच्यावर झाली. नाही तर ते सुद्धा त्याच प्रवाहांत वाहून गेले असते; ज्यांत काही मुसलमान वाहून गेले होते. म्हणजे शैतानाचे डाव आणि धोक्यापासून वांचण्यासाठी, एक तर प्रत्येक वेळी, अल्लाहची मदत मागा; आणि त्याच्याकडे वळत रहा; आणि दुसरे ते लोक आपल्या मनाच्या कमजोरीमुळे, शैतानाच्या फसवणुकीला बळी पडले आहेत, त्यांना जास्त टिकेचे लक्ष्य बनवू नका, किंबहुना हितचिंतक म्हणून त्यांच्यात सुधारणा करण्याचा प्रयत्न करा.

५) हजरत मिसतअ ﵁, जे आळ घेण्याच्या घटनेत लिप्त होऊन गेले होते, मुहाजरीन मधल्या गरीब लोकांमधून होते. आणि नात्यात ह. अबुबकर ﵁ चे मावसभाऊ होते. याचसाठी ह.अबुबकर सिद्दीक ﵁ त्यांचे मददगार आणि निर्वाहाचे जबाबदार होते. जेव्हा हे सुद्धा ह.आयेशा ﵂ च्या विरोधी मोहिमेत शामिल होऊन गेले, तेव्हा ह.अबुबकर सिद्दीक ﵁ ला. फारच दु:ख झाले; जे एक स्वाभाविक होते. म्हणून निर्दोषत्वाच्या प्रकटीकरणानंतर, रागाने त्यांनी शपथ खाऊन घेतली की, ते यापुढे ह.मिसतअ ﵁ ला काही फायदा पोहचवणार नाही. ह.अबुबकर सिद्दीक ﵁ ची ही शपथ, जरी मानवी स्वभावानुसार होती, तथापि सत्यतेचे स्थान याच्यापेक्षा उच्च कर्तृत्वाचे होते, म्हणून अल्लाहतआलाला आवडले नाही. आणि हे महावाक्य प्रकट केले.ज्याच्यांत मोठ्या प्रेमाने, त्यांच्या या लगेच उचललेल्या मानवी पावलांवर, सावध करण्यात आले की, तुमच्याकडून पण चुका होत असतात. आणि तुम्ही हे इच्छितात की, अल्लाहतआलाने तुमच्या चुका माफ करीत रहावे. तर मग तुम्ही सुद्धा दुसऱ्यांबरोबर क्षमा आणि सोडून देण्याचा मामला का करीत नाही? काय तुम्हाला आवडत नाही की, अल्लाहतआलाने तुमच्या चुकांना माफ करून टाकावे? ही वर्णन शैली इतकी परिणामकारक होती की तिला ऐकताच ह.अबुबकर सिद्दिक ﵁ आपोआप बोलून उठले, ''का नाही? हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही जरूर असे इच्छितो की, तू आम्हास क्षमा करून टाकावेस'' याच्यानंतर त्यांनी आपल्या शपथेचे प्रायश्चित्त करुन, पूर्वीप्रमाणेच ह.मिसतअ ﵁ ची आर्थिक मदत सुरू करून दिली. (फत्हुल कदीर, इब्ने कसीर)

إِنَّ الَّذِينَ يَرْمُونَ الْمُحْصَنَاتِ الْغَافِلَاتِ الْمُؤْمِنَاتِ لُعِنُوا فِي الدُّنْيَا وَالْآخِرَةِ وَلَهُمْ عَذَابٌ عَظِيمٌ ﴿٢٣﴾

नि:संशय जे लोक पवित्र चरित्र भोळ्या भाबड्या, ईमानवाल्या स्त्रियांवर आळ घेतात, ते इहलोकांत आणि परलोकांत शापित आहेत; आणि त्यांच्यासाठी फार मोठी शिक्षांआहे. [१] (२३)

يَوْمَ تَشْهَدُ عَلَيْهِمْ أَلْسِنَتُهُمْ وَأَيْدِيهِمْ وَأَرْجُلُهُمْ بِمَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿٢٤﴾

जेव्हा की, त्यांच्या मुकाबल्यांत, त्यांची जिव्हा आणि त्यांचे हात पाय, त्यांच्या कर्मांची साक्ष देतील [२] (२४)

يَوْمَئِذٍ يُوَفِّيهِمُ اللَّهُ دِينَهُمُ الْحَقَّ وَيَعْلَمُونَ أَنَّ اللَّهَ هُوَ الْحَقُّ الْمُبِينُ ﴿٢٥﴾

त्या दिवशी अल्लाहतआला त्यांना पुरा पुरा बदला, सत्य आणि न्यायाने देईल; आणि ते जाणून घेतील की, अल्लाहतआलाच सत्त्य आहे, (आणि तोच) जाहीर करणारा आहे. (२५)

الْخَبِيثَاتُ لِلْخَبِيثِينَ وَالْخَبِيثُونَ لِلْخَبِيثَاتِ ۖ وَالطَّيِّبَاتُ لِلطَّيِّبِينَ وَالطَّيِّبُونَ لِلطَّيِّبَاتِ ۚ أُولَٰئِكَ مُبَرَّءُونَ مِمَّا يَقُولُونَ ۖ لَهُمْ مَغْفِرَةٌ وَرِزْقٌ كَرِيمٌ ﴿٢٦﴾

दुष्ट स्त्रिया दुष्ट पुरुषांसाठी, योग्य आहेत; आणि दुष्ट पुरूष, दुष्ट स्त्रीयांसाठी योग्य आहेत. आणि पवित्र स्त्रीयां, पवित्र पुरुषांसाठी योग्य आहेत; [३] आणि पवित्र पुरुष पवित्र स्त्रीयांसाठी योग्य आहेत. अशा पवित्र लोकांच्या संबंधात, जे काही, बकवास आणि आळ घेणारे, करीत आहेत, ते त्यापासून बिलकुल निर्दोष आहेत. त्यांच्याकरीता क्षमा आणि इज्जत आबरूची रोजी आहे. [४] (२६)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تَدْخُلُوا بُيُوتًا غَيْرَ بُيُوتِكُمْ حَتَّىٰ تَسْتَأْنِسُوا وَتُسَلِّمُوا عَلَىٰ أَهْلِهَا ۚ ذَٰلِكُمْ خَيْرٌ لَكُمْ لَعَلَّكُمْ تَذَكَّرُونَ ﴿٢٧﴾

अहो ईमानवाल्यांनो आपल्या घरांशिवाय, दुसऱ्या घरांमध्ये जाऊ नका, जोपर्यंत की, परवानगी न घेऊन घ्याल. आणि तेथे रहाणाऱ्यांना सलाम करुन घ्या. [५] हेच तुमच्यासाठी निव्वळ उत्तम आहे; कारण की तुम्ही उपदेश ग्रहण करावा [६] (२७)

فَإِنْ لَمْ تَجِدُوا فِيهَا أَحَدًا فَلَا تَدْخُلُوهَا حَتَّىٰ يُؤْذَنَ لَكُمْ ۖ وَإِنْ قِيلَ لَكُمُ ارْجِعُوا فَارْجِعُوا ۖ هُوَ أَزْكَىٰ لَكُمْ ۚ وَاللَّهُ بِمَا تَعْمَلُونَ عَلِيمٌ ﴿٢٨﴾

जर तुम्हांस तेथे कोणीही मिळूंशकले नाही, तर मग परवानगी मिळाल्याशिवाय आंत जाऊ नका. आणि जर तुम्हांस परत जाण्यास सांगण्यात येईल, तर तुम्ही परतच जा. हीच गोष्ट तुमच्या चोखेपणाची आहे. जे काही तुम्ही करीत आहात आणि अल्लाहतआला त्याला फार चांगल्याप्रकारे जाणतो (२८)

لَيْسَ عَلَيْكُمْ جُنَاحٌ أَنْ تَدْخُلُوا بُيُوتًا غَيْرَ مَسْكُونَةٍ فِيهَا مَتَاعٌ لَكُمْ ۚ وَاللَّهُ يَعْلَمُ مَا تُبْدُونَ وَمَا تَكْتُمُونَ ﴿٢٩﴾

हां! निर्जन घरांमध्ये, जेथे तुमचा काही फायदा, किंवा सामान असेल, जाण्यांत तुमच्यावर काही दोष नाही. [७] तुम्ही जे पण जाहीर करतात, आणि जे लपवितात, अल्लाहतआला सर्व काही जाणतो. [८] (२९)

قُلْ لِلْمُؤْمِنِينَ يَغُضُّوا مِنْ أَبْصَارِهِمْ وَيَحْفَظُوا فُرُوجَهُمْ ۚ ذَٰلِكَ أَزْكَىٰ لَهُمْ ۗ إِنَّ اللَّهَ خَبِيرٌ بِمَا يَصْنَعُونَ ﴿٣٠﴾

मुसलमान पुरूषांना सांगा की आपली नजर खाली ठेवावी, [९] आणि आपली लाज सांभाळावी. [१०] हेच त्यांच्यासाठी विशेष निर्मल आहे. लोक जे काही करतील, ते अल्लाहला सर्व माहित आहे. (३०)

१) काही भाष्यकारांनी या महावाक्याला, ह.आयेशा आणि दुसऱ्या पवित्र पत्नीच्या (रजी. अल्लाह अनहत) बरोबर खास ठरविले आहे. की, या महावाक्यांत विशेष म्हणून, त्यांच्यावर आळ घेण्याची शिक्षा, सांगण्यात आली आहे. आणि ती ही आहे की, त्यांच्यासाठी पश्चात्ताप केले कि नाही केले हद्द जारी करने आहे. आणि काही भाष्यकारांनी याला सर्वसाधारणच ठेवले आहे; आणि याच्यांत तीच खोट्या आळाची शिक्षा सांगितली आहे, जी पहिले येऊन चुकली आहे. जर आळ घेणारा मुसलमान आहे, तर शापाचा अर्थ होईल, तो शिक्षेस पात्र होईल. आणि मुसलमानांकरीता तिरस्कार आणि बहिष्काराला पात्र. आणि जर काफिर आहे, तर भावार्थ स्पष्टच आहे की, तो इहलोक आणि परलोकांत शापित, म्हणजे अल्लाहच्या दयेकडून वंचित आहे.

२) जसे की, कुरआन करीममध्ये दुसऱ्या स्थानांवर पण, आणि हदीसींमध्ये सुद्धा, हा विषय सांगण्यात आला आहे.

३) याचा एक अर्थ तर हाच सांगण्यात आला आहे, जो भाषांतराने स्पष्ट आहे. अशा स्वरूपात हे ''अज्जानी ला

यनकिहु इल्ला जानियतन्'' च्या समान अर्थांत, महावाक्य होईल. आणि खबीसात आणि खबीसून, ने व्याभिचारी स्त्री पुरूष आणि तय्यबात व तय्यबून ने स्वच्छ चारित्र्याचे निष्कलंक, स्त्री आणि पुरूष अभिप्रेत असतील. दुसरा याचा अर्थ हा आहे की, गलिच्छ गोष्टी, गलिच्छ पुरूषांसाठी आणि गलिच्छ पुरूष, गलिच्छ गोष्टींसाठी आहेत. आणि चांगल्या गोष्टी, चांगल्या पुरूषांसाठी, आणि चांगले पुरूष चांगल्या गोष्टींसाठी आहे. आणि अर्थ हा होईल, गलिच्छ गोष्टी तेच स्त्री पुरूष करतात, जे गलिच्छ आहेत. आणि चांगल्या गोष्टी करणे, चांगल्या स्त्री पुरूषांची रीत आहे. याच्यांत इशारा आहे या गोष्टीकडे की, ह.आयेशा ﵂ वर, गलिच्छ गोष्टीचा आरोप करणारे गलिच्छ, आणि त्यांच्याकडून त्यांना निर्दोष करणारे चांगले (पवित्र) आहेत.

४) याच्याने अभिप्रेत स्वर्गांतील उपजिवीका आहे. जी ईमानवाल्यांच्या दैवांत असेल.

५) मागील महावाक्यांमध्ये व्याभिचार आणि आळ घेणे, आणि त्यांच्या शिक्षांचे वर्णन येऊन चुकले. आतांअल्लाहतआला, घरांमध्ये दाखल होण्याचे शिष्टाचार, सांगत आहे. कारण की स्त्री पुरूषाच्या दर्म्यान, मिळणे जुळणे न व्हावे. जे सर्व साधारणपणे व्याभिचार किंवा व्याभिचाराच्या आळाला कारणीभूत होते. 'इस्तिनास' चा अर्थ आहे, माहित करून घेणे. म्हणजे जोपर्यंत तुम्हांस हे माहित होऊन जाणार नाही की, आंत कोण आहे आणि त्याने तुम्हांस आंत येण्याची परवानगी देऊन दिली आहे, तोपर्यंत आत प्रवेश करू नये. काहींनी 'तस्तअ्निसु' चा अर्थ 'तसतअ्जनु' चा केला आहे. जसे की भाषांतराने स्पष्ट आहे. महावाक्यांमध्ये, प्रवेश करण्याची परवागनी मागण्याचा उल्लेख प्रथम आणि सलाम करण्याचा उद्देश्य नंतर आहे. परंतु हदीसने ठाऊक होते की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, प्रथम सलाम करीत, मग प्रवेश करण्याची परवानगी मागत. अशाच प्रकारे आपण ﷺ ची ही पद्धत पण होती की, तीनदा आपण परवानगी मागत जर काही उत्तर आले नाही, तर आपण ﷺ परत जात. आणि ही पण आपली शुभ संवय होती की, परवानगी मागतेवेळी, आपण ﷺ दरवाज्याच्या उजवीकडे किंवा डावीकडे उभे रहात; कारण की एकदम आमना सामना होऊ नये. ज्यांत बेपरद्याची शक्यता असते. (कृपया पहावे स.बुखारी मुसनद अहमद १३८/३, अबुदाऊद) अशाच प्रकारे आपण ﷺ नी दरवाज्यांत उभे राहून, आंत डोकवण्यापासून पण, कडकपणे मना केले आहे; येथ पावेतो की जर कोण्या माणसाने, डोकावणाऱ्या माणसाचा डोळा फोडून टाकला; तर आपण ﷺ नी फर्माविले, त्याच्यावर काही गुनाह नाही. (अल्‌बुखारी किताबुल दियात स.मस्लिम) आपण ﷺ नी या गोष्टीला पण नापसंत केले की, जेव्हा आतून घरमालक विचारेल कोण आहे? तर त्याच्या उत्तरात 'मी ' मी म्हटले जावे. याचा अर्थ हा की, नांव घेऊन आपली ओळख करून द्यावी. (स.बुखारी)

६) म्हणजे कर्म करा. अर्थ हा आहे की, परवानगी मागणे आणि सलाम करणे, याच्यानंतर घरांत दाखल होणे. दोघांसाठी अचानक दाखल होण्यापेक्षा उत्तम आहे.

७) याच्याने अभिप्रेत कोणती घरे आहेत, ज्यांच्यात परवानगीशिवाय, प्रवेश करण्याची, परवानगी दिली जात आहे. काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत ती घरे आहेत जी विशेष करून पाहुण्यांसाठी वेगळी तयार किंवा खास करून दिली गेली असतील. याच्यांत घरमालकाची पहिल्यावेळा परवानगी पुरेशी आहे. काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत धर्मशाळा आहेत, या प्रवाशांसाठीच असतात. किंवा व्यापारी घरे (दुकाने) आहेत. 'मताऊन' चा अर्थ फायद्याचा आहे, म्हणजे ज्याच्यात तुमचा काही फायदा आहे.

८) याच्यात त्या लोकांसाठी धमकावणी आहे, जे दुसऱ्यांच्या घरात दाखल होते वेळी, चर्चित शिष्टारांचा विचार करीत नाही.

९) जेव्हा कोणाच्या घरात दाखल होण्याची परवानगी घेण्याला आवश्यक ठरविले गेले, तर त्याच्या बरोबरच, नजर खाली ठेवण्याचा हुकूम दिला, कारण की परवानगी मागणारा सुद्धा, विशेष करून आपल्या नजरेवर नियंत्रण ठेवेल.

१०) म्हणजे अयोग्य उपयोगापासून, त्यांना वांचवावे, किंवा त्यांना अशा प्रकारे लपवून ठेवावे की, त्यांच्यावर कोणाची नजर पडू नये. याचे हे दोन्ही भावार्थ बरोबर आहेत. कारण की, दोन्हीही वांच्छनीय आहेत. याशिवाय नजरेच्या संरक्षणाचा पहिले उल्लेख केला. कारण की यामध्ये निष्काळजीपणा हा व्याभिचाराला कारणीभूत ठरतो.

وَقُلْ لِّلْمُؤْمِنٰتِ يَغْضُضْنَ مِنْ اَبْصَارِهِنَّ وَيَحْفَظْنَ فُرُوْجَهُنَّ وَلَا يُبْدِيْنَ زِيْنَتَهُنَّ اِلَّا مَا ظَهَرَ مِنْهَا وَلْيَضْرِبْنَ بِخُمُرِهِنَّ عَلٰى جُيُوْبِهِنَّ ۖ وَلَا يُبْدِيْنَ زِيْنَتَهُنَّ اِلَّا لِبُعُوْلَتِهِنَّ اَوْ اٰبَآئِهِنَّ اَوْ اٰبَآءِ بُعُوْلَتِهِنَّ اَوْ اَبْنَآئِهِنَّ اَوْ اَبْنَآءِ بُعُوْلَتِهِنَّ اَوْ اِخْوَانِهِنَّ اَوْ بَنِيْٓ اِخْوَانِهِنَّ اَوْ بَنِيْٓ اَخَوٰتِهِنَّ اَوْ نِسَآئِهِنَّ اَوْ مَا مَلَكَتْ اَيْمَانُهُنَّ اَوِ التّٰبِعِيْنَ غَيْرِ اُولِي الْاِرْبَةِ مِنَ الرِّجَالِ اَوِ الطِّفْلِ الَّذِيْنَ لَمْ يَظْهَرُوْا عَلٰى عَوْرٰتِ النِّسَآءِ ۖ وَلَا يَضْرِبْنَ بِاَرْجُلِهِنَّ لِيُعْلَمَ مَا يُخْفِيْنَ مِنْ زِيْنَتِهِنَّ ؕ وَتُوْبُوْٓا اِلَى اللّٰهِ جَمِيْعًا اَيُّهَ الْمُؤْمِنُوْنَ لَعَلَّكُمْ تُفْلِحُوْنَ ﴿٣١﴾

**आणि मुसलमान स्त्रियांना सांगा की, त्यांनी पण आपल्या नजरा खाली ठेवाव्यात; आणि आपली लाज सांभाळावी. (१) आणि आपल्या शृंगारास जाहीर करू नये. (२) पण त्याच्याशिवाय की जो जाहीर आहे. (३) आणि आपल्या अंगावर आपले पदर घेऊन रहावे. (४) आणि आपल्या शृंगाराला जाहीर न करावे (५), शिवाय आपल्या पतीवर, (६) किंवा आपल्या वडिलांवर किंवा आपल्या सासऱ्यावर, किंवा आपल्या मुलांवर, किंवा आपल्या पतीच्या मुलावर किंवा आपल्या भावावर किंवा आपल्या पुतण्यांवर किंवा आपल्या भाच्यावर (७) किंवा आपल्या सहवासाच्या स्त्रियांवर, (८) किंवा गुलामावर (९) किंवा अशा नोकर चाकर पुरूषांवर, जे कामेच्छा बाळगत नाहीत, (१०) किंवा अशी मुले, ज्यांना स्त्रियांच्या पडद्याची समज आलेली नाही. (११) आणि अशा प्रकारे पाय आपटत जोरजोरात चालू नये की, त्यांचा गुप्त शृंगार माहित होऊन जावा. (१२) अहो मुसलमानांनो! तुम्ही सर्वच्या सर्व अल्लाहसमोर तौबा करा. कारण की तुम्हांस मुक्ती मिळावी (१३) ३१**

وَاَنْكِحُوا الْاَيَامٰى مِنْكُمْ وَالصّٰلِحِيْنَ مِنْ عِبَادِكُمْ وَاِمَآئِكُمْ ؕ اِنْ يَّكُوْنُوْا فُقَرَآءَ يُغْنِهِمُ اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖ ؕ وَاللّٰهُ وَاسِعٌ عَلِيْمٌ ﴿٣٢﴾

**तुमच्यातून जे स्त्री पुरुष अविवाहीत असतील, त्यांची लग्ने करून द्या. (१४) आणि आपल्या सदाचरणी दास आणि दासींचे पण. (१५) जर ते गरीब पण असतील, तर अल्लाहतआला आपल्या कृपेने त्यांना श्रीमंत बनवून देईन. (१६) अल्लाहतआला उदार आणि जाणणारा आहे. ३२**

१) स्त्रिया जरी, नजर खाली ठेवणे, आणि आपली लाज सांभाळणे, याच्या पहिल्या हुकूमांत दाखल होत्या, जो सर्व ईमानवाल्यांना दिला गेला आहे; आणि ईमानवाल्यांमध्ये, ईमानवाल्या स्त्रियापण सर्वसाधारणपणे शामीलच होतात. परंतु या समस्यांच्या महत्त्वाला दृष्टीसमोर ठेवून, स्त्रियांना सुद्धा खास म्हणून, दुसऱ्यांदा तोच हुकूम दिला जात आहे; ज्याचा उद्देश्य ताकीद करणे आहे. काही धर्मपंडितांनी याचा आधार घेत म्हटले आहे की, ज्याप्रमाणे पुरूषांसाठी, स्त्रियांना पाहणे मना आहे, त्याचप्रमाणे स्त्रियांकरीता, पुरूषांना पाहणे, बिलकुल मना आहे. आणि काहींनी त्या हदीशीने आधार घेत, ज्यात ह.आयेशा رضي الله عنها चा हबशांचा खेळ पाहण्याचा उल्लेख आहे. कामेच्छेशिवाय, पुरूषांकडे पाहण्याची, स्त्रियांना परवानगी देण्यात आली आहे.

२) शृंगाराने अभिप्रेत तो पोषाख आणि दागिने आहेत, जे स्त्रिया आपल्या रूपसौंदर्यात आणखी उठाव येण्यासाठी घालत असतात; ज्यांची ताकीद त्यांना आपल्या पतीसाठी, करण्यात आली आहे. जेव्हा पोषाख आणि दागिन्यांचे प्रदर्शन, पतीशिवाय इतरांच्या समोर, स्त्रीला मना आहे. तर शरीराला उघड करणे आणि दाखविण्याची परवानगी, इस्लाममध्ये कशी होऊ शकेल? हे तर सर्व प्रकारे हराम आणि मना आहे.

३) याच्याने अभिप्रेत, तो शृंगार आणि शरीराचा भाग आहे, ज्याचे लपविणे आणि परदा करणे शक्य नसावे. जसे कोणास काही वस्तू देतांना, किंवा त्याच्यापासून घेतांना, तळहातांचा किंवा पाहतांना, डोळ्यांचे जाहीर होताना या संदर्भात हातात जी अंगठी घातलेली किंवा मेहंदी लावलेली असेल, डोळ्यांत सुरमा किंवा काजळ असेल, किंवा पोषाख आणि शृंगाराला लपविण्यासाठी जो बुर्का किंवा चादर घेतली जाते, ती पण एक शृंगारच आहे. तथापि हे सारे शृंगार असे आहेत, ज्यांचे जाहीर करणे, आवश्यक असेल त्या वेळी, किंवा आवश्यकतेनुसार विहीत (मुबाह) आहे.

४) कारण की, डोके, मान छाती यांचा परदा होऊन जावा. कारण त्यांना पण बेपर्दा करण्याची परवानगी नाही.

५) हा तोच शृंगार आहे, ज्याला जाहीर करण्याची मनाई, याच्यापूर्वी केली गेली होती. म्हणजे पोषाख आणि दागीने वगैरे जे चादर किंवा बुरख्याच्या खाली असतात, येथे त्याचा उल्लेख आता वेगळे करण्याच्या संदर्भात आला आहे. की या या लोकांच्या समोर त्या शृंगाराला जाहीर करणे योग्य आहे.

६) याच्यांत सर्वांत प्रथम पती आहे. म्हणून पतीला सर्वांमध्ये प्राधान्य देण्यात आले आहे. कारण की स्त्रीचा सर्व शृंगार पतीसाठीच असतो. आणि पतीसाठी स्त्रीचे सारे शरीरच हलाल (विहीत) आहे. याच्याशिवाय ज्या महारीम, आणि दुसऱ्या काही माणसांचा, ज्यांचे नेहमी घरांत येणे जाणे असते आणि सानिध्य आणि नातेसंबंधामुळे, किंवा दुसऱ्या कारणाने, स्वाभाविकपणे ज्यांच्याकडे लैंगिक आकर्षण पण नसते ज्यामुळे फितन्यांत व्यस्त होण्याचे भय असावे; तर शरीयत (धर्मशास्त्रा) ने अशा लोकांसमोर, ज्यांच्यापासून काही धोका नसेल, आणि सर्व महारीम समोर, शृंगार जाहीर करण्याची परवानगी दिली आहे. या ठिकाणी मामा आणि काकांचा उल्लेख केला गेला नाही. बहुसंख्य

धर्मपंडितांजवळ, हे पण त्या महारिममधून आहेत, ज्यांच्यासमोर शृंगार जाहीर करण्याची परवानगी दिली गेली आहे. आणि काही जवळ हे महारिम मधून नाहीत. (फत्हुल कदीर)

७) वडिलांमध्ये, आजोबा खापर आजोबा, (आईकडून) आजोबा, खापर आजोबा, आणि यांच्यावर सर्व शामील आहेत. अशाच प्रकारे सासऱ्यांत, सासऱ्याचे वडील, आजोबा, खापर आजोबा, वर पर्यंत. मुलांमध्ये नातू, पर नातू (आईकडून) नातू पर नातू, खालपर्यंत. पतीच्या मुलांमध्ये नातू परनातू खालपर्यंत भावांमध्ये तिन्ही प्रकारचे भाऊ (सगे आणि सावत्र- वेगळ्या आईपासून वेगळ्या बापापासून) आणि त्यांची मुले, नातू, पर नातू, आणि आईकडून नातू पर नातू, खालपर्यंत. पुतण्यांमध्ये, त्यांची मुले, खालपर्यंत. आणि भाच्यांमध्ये तिन्ही प्रकारच्या बहिणींची संतती शामील आहे.

८) याच्याने अभिप्रेत मुसलमान स्त्रिया आहेत, ज्यांना या गोष्टीपासून मना करण्यांत आले आहे की, तिने कोण्या स्त्रीचा शृंगार, तिचे रूप सौंदर्य आणि शरीर काठी (अंग यष्टी) आपल्या पतीसमोर वर्णन करावी. काहींनी याच्याने विशिष्ट स्त्रिया गृहीत धरल्या आहेत, ज्या सेवा चाकरीसाठी नेहमी बरोबर राहतात ज्याच्यांत दासीपण शामील आहेत.

९) काहींनी याच्याने अभिप्रेत फक्त दासी, आणि काहींनी फक्त गुलाम घेतले आहेत. आणि काहींनी दोघांनाही धरले आहे. हदीसमध्येही खुलासा आहे की, गुलामाबरोबर पर्दा करण्याची आवश्यकता नाही. (अबुदाऊद) अशाच प्रकारे काहींनी याला सर्वसाधारण ठेवले आहे. ज्यांत मोमिन आणि काफिर दोन्ही गुलाम शामील आहे.

१०) काहींनी याच्याने फक्त ती माणसे अभिप्रेत धरली आहेत, ज्यांचा घरांत राहण्याने खाण्यापिण्याशिवाय आणखी काही उद्देश्य नाही. काहींनी मूर्ख, काहींनी नामर्द आणि खच्ची केलेला, आणि काहींनी फारच वृद्ध, अभिप्रेत धरले आहेत. इमाम शौकानी म्हणतात की, ज्यांच्यात कुरआनांत वर्णन केलेले वैशिष्टय आढळून येईल, ते सर्व याच्यांत शामील, आणि दुसरे निष्कासित होतील.

११) याच्याने अशी मुले निष्कासित होतील, जे तरूण असतील किंवा तारूण्याच्या जवळपास असतील. कारण की ते स्त्रियांच्या परद्याच्या गोष्टींचे जाणणारे असतात.

१२) कारण की पैंजणांच्या किनकिनाटाने, पुरूषांचे तिच्याकडे लक्ष जाऊ नये. याच्यांत उंट ऐडिचे ते सॅण्डल पण येतात, ज्यांना घालून स्त्रिया चालतात, तेव्हा टक् टक् ची आवाज, दागीन्याच्या किनकिनाटापेक्षा, कमी असत नाही. अशाच प्रकारे हदीसमध्ये येते की, स्त्रीला सुगंध लावून, घराच्या बाहेर निघणे योग्य नाही. जी स्त्री अशी करते, ती कुकर्मी आहे. (तिर्मिझी अबुदाऊद)

१३) येथे परद्याच्या आदेशांत, तौबाची हुकूम देण्यामध्ये, हे प्रयोजन वाटते की, अज्ञान काळामध्ये, या आदेशांच्या विरुद्ध जी वागणूक तुम्ही पण करीत राहिला आहात, ती कारण की, इस्लामच्या पूर्वीची गोष्ट आहे; म्हणून जर तुम्ही खऱ्या मनाने तौबा करून घेतली, आणि या चर्चित आदेशांप्रमाणे परद्याचे योग्य पालन करून घेतले, तर यश आणि साफल्य, आणि इहलोकात आणि परलोकांत, सद्भाग्य तुमच्या नशिबी आहे.

१४) 'अयामा' 'अइमुन' चे अनेकवचन आहे. 'अइमुन' अशा स्त्रीला म्हणण्यांत येते, जिचा पती नसावा. ज्यांत विधवा कुमारी आणि घटस्फोटीता तिन्ही येऊन जातात. आणि अशा पुरूषाला पण 'अइमुन' म्हणतात, ज्याची पत्नी नसावी. महावाक्यात संबोधित वली आहेत की, त्यांनी त्यांचे लग्न करून द्या. हे नाही सांगितले की लग्न करून घ्या; की, संबोधित लग्न करणारे पुरूष आणि स्त्री असते. याच्याने ठाऊक झाले की स्त्री, वलीची परवानगी आणि रजामंदी शिवाय, स्वत:हून आपले लग्न करू शकत नाही. ज्याचे समर्थन हदीर्शीनी पण होते. अशाचप्रमाणे अमरच्या सेग्याने, काहींनी आधार घेतला आहे की, लग्न करणे वाजीब आहे. जेव्हाकी काहींना याला मुबाह, आणि काहींनी मुस्तहब ठरविले आहे. तथापि सामर्थ्य बाळगणाऱ्यांसाठी हे सुन्नते मुअक्कदा जरूर आहे. आणि यापासून विन्मुख होणे, कडक शिक्षा देण्याला कारणीभूत आहे. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे फर्मान आहे, ''ज्याने माझ्या सुन्नतकडून तोंड फिरविले, तो माझ्यातून नाही. (अल्बुखारी क्र.५०६३, आणि मुस्लिम क्र.१०२०)

१५) येथे सालिहीयत ने अभिप्रेत ईमान आहे. याच्यांत मतभेद आहे की, मालक आपल्या गुलाम आणि दासींना, लग्न करण्यांस भाग पाडू शकतो किंवा नाही? काही याला मान्यता देतात, काही नाही. तथापि कुकर्म होण्याच्या भीतीने, भाग पाडणे, योग्य आहे. दुसऱ्या स्वरूपांत अयोग्य (अयसरुत तफासीर)

१६) म्हणजे निव्वळ गरीबी आणि तंगी, लग्न करण्यास अडचण होऊ नये. शक्य आहे लग्नानंतर, अल्लाह त्यांच्या तंगदस्तीला, आपल्या कृपेने सुबत्ता आणि विपुलतेत बदलून देईल. हदीसमध्ये येते, तीन माणसे आहेत, ज्यांची अल्लाहतआला जरूर मदत करतो. एक लग्न करणारा, जो निष्कलंक रहाण्याच्या नियतीने लग्न करतो. २) मुकातब गुलाम, जो देण्याची नियत ठेवतो. ३) आणि अल्लाहच्या मार्गात जिहाद करणारा. (तिर्मिझी)

وَلْيَسْتَعْفِفِ الَّذِيْنَ لَا يَجِدُوْنَ نِكَاحًا حَتّٰى يُغْنِيَهُمُ اللّٰهُ مِنْ فَضْلِهٖ ۭ وَ الَّذِيْنَ يَبْتَغُوْنَ الْكِتٰبَ مِمَّا مَلَكَتْ اَيْمَانُكُمْ فَكَاتِبُوْهُمْ اِنْ عَلِمْتُمْ فِيْهِمْ خَيْرًا ڰ وَّ اٰتُوْهُمْ مِّنْ مَّالِ اللّٰهِ الَّذِيْٓ اٰتٰىكُمْ ۭ وَلَا تُكْرِهُوْا فَتَيٰتِكُمْ عَلَى الْبِغَاۗءِ اِنْ اَرَدْنَ تَحَصُّنًا لِّتَبْتَغُوْا عَرَضَ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۭ وَمَنْ يُّكْرِهْهُّنَّ فَاِنَّ اللّٰهَ مِنْۢ بَعْدِ اِكْرَاهِهِنَّ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ۝٣٣

आणि त्या लोकांना सद्‌चारित्र्य रहावयास पाहिजे, जे आपले लग्न करण्याचे सामर्थ्य ठेवित नाहीत; (१) येथपावेतो की, अल्लाहतआला त्यांना आपल्या कृपेने, श्रीमंत बनवून टाकेन; तुमच्या दासांमधून, जो कोणी तुम्हांस काही देऊन सुटकेचा लेख करू इच्छील, तर तुम्ही असा लेख, त्यांना करून देत चला. जर तुम्हांस त्यांच्यात काही भलाई दिसून येत असेल; (२) आणि अल्लाहने तुम्हांस जे धन देऊन ठेवले आहे, त्यातून त्यांना पण द्या. (३) तुमच्या ज्या दासी पतीव्रता राहू इच्छित असतील, त्यांना ऐहिक दुनियाच्या फायद्यासाठी, कुकर्म करावयास भाग पाडू नका. (४) आणि जो त्यांना भाग पाडील, तर अल्लाहतआला, सक्तीनंतर, क्षमाकर्ता आणि दयाळूआहे. (५) ३३

وَلَقَدْ اَنْزَلْنَآ اِلَيْكُمْ اٰيٰتٍ مُّبَيِّنٰتٍ وَّ مَثَلًا مِّنَ الَّذِيْنَ خَلَوْا مِنْ قَبْلِكُمْ وَمَوْعِظَةً لِّلْمُتَّقِيْنَ ۝٣٤

आणि आम्ही तुमच्याकडे स्पष्ट आणि तेजपुंज महावाक्ये, अवतरीत केली आहे. आणि त्या लोकांचे अहवाल, जे तुमच्यापूर्वी होऊन गेले आहेत. आणि अल्लाहला भिऊन वागणाऱ्यांसाठी उपदेश ३४

१) हदीसमध्ये निष्कलंक रहाण्यासाठी, जो पर्यंत लग्न करण्याचे सामर्थ्य प्राप्त न होऊन जाईल, नफिल उपवास ठेवण्याची ताकीद करण्यात आली आहे. फर्माविले, ''हे नवतरूणांच्या समूहा! तुमच्यातून जो लग्न करण्याची शक्ती बाळगतो, त्याला (आपल्या वेळेवर) लग्न करून घ्यावयांस पाहिजे. यासाठी की यामुळे डोळे आणि गुप्तेंद्रियांचे संरक्षण होऊन जाते; आणि जो लग्नाचे सामर्थ्य ठेवत नाही, त्याला पाहिजे की त्याने (भरपूर) नफिल उपवास ठेवावे. उपवास त्याच्या लैंगिक इच्छेला काबुत ठेवतील.'' (अल्‌बुखारी, स.मुस्लिम)

२) 'मुकातब' त्या गुलामाला म्हणण्यात येते, जो आपल्या धन्याशी करार करून घेतो की मी इतकी रक्कम जमा करून, तुम्हास देऊन देईल, तर स्वतंत्र होण्यास पात्र होऊन जाईन. 'चांगुलपणा दिसेल' चा अर्थ आहे, त्याच्या खऱ्या आणि विश्वसनीय होण्याचा तुम्हांस विश्वास असेल. किंवा कोण्या कला कौशल्य आणि कारागिरीचे ज्ञान असेल; कारण की त्याने श्रम करून, कमवावे आणि रक्कम पूर्ण करून द्यावी. इस्लामने जास्तीत जास्त, गुलामी प्रथेचे निर्मूलन करण्याचे धोरण अंगिकारले होते; म्हणून येथे सुद्धा धन्यांना ताकीद केली गेली की, 'मुकातब' च्या इच्छुक गुलामांशी करार करण्याला टाळाटाळ करू नका; या शर्तीवर की तुम्हांस त्यांच्यात अशी गोष्ट माहित व्हावी की, ज्यामुळे तुमच्या रकमेचे अदा करणे, पण त्यांना शक्य व्हावे. काही गुलामांजवळ हा हुकूम आवश्यक म्हणून, आणि काहींच्या जवळ पसंतीसाठी आहे.

३) याचा अर्थ आहे की, गुलामीपासून स्वातंत्र्य मिळविण्यासाठी, त्याने जो करार केला आहे. आणि आता तो रकमेसाठी गरजवंत आहे, की त्याने कराराप्रमाणे रक्कम अदा करून द्यावी. तर तुम्ही सुद्धा त्याची आर्थिक मदत करा. जर अल्लाहने तुम्हाला सामर्थ्य दिले आहे. म्हणून अल्लाहतआलाने जकातीला खर्च करण्याची आठ ठिकाणे (सू.तौबा-६०) सांगितली आहेत, त्यांच्यातून एक 'फिर्‌रिकाब' पण आहे. ज्याचा अर्थ आहे माना मुक्त करण्यामध्ये; म्हणजे गुलामांना स्वतंत्र करण्यांत पण, जकातीची रक्कम खर्च केली जाऊ शकते.

४) अज्ञान काळांत, लोक निव्वळ ऐहिक संपत्तीसाठी, आपल्या दासींना कुकर्म करण्यास भाग पाडीत असत. म्हणून इच्छा असो किंवा नसो त्यांना हा अपमानाचा डाग सहन करावा लागत असे. अल्लाहतआलाने मुसलमानांना असे करण्यापासून मना केले. नाही तर उद्देश्य हा नाही की, जर त्या कुकर्माला पसंत करतील, तर मग तुम्ही त्यांच्याकडून हे काम करून घेत चला. परंतु हुकूम देण्याचा हा उद्देश्य आहे की, दासींकडून, ऐहिक थोड्याश्या पैशासाठी, हे काम करवून घेऊ नका. कारण की अशा प्रकारची कमाई, हीच हराम आहे. जसे की हदीसमध्ये आहे.

५) म्हणजे ज्या दासींकडून बळजबरीने हे निर्लज्जपणाचे काम करवून घेतले जाईल, तर गुन्हेगार मालक होईल. म्हणजे बळजबरी करणारा; न की दासी, जी भाग पाडली गेली. हदीसमध्ये येते, ''माझ्या उम्मतकडून, चुका, भुलचूक, आणि असे काम जे बळजबरीने करविले गेले असेल, माफ आहेत.'' (इब्ने माजा)

ٱللَّهُ نُورُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلۡأَرۡضِۚ مَثَلُ نُورِهِۦ كَمِشۡكَوٰةٖ فِيهَا مِصۡبَاحٌۖ ٱلۡمِصۡبَاحُ فِي زُجَاجَةٍۖ ٱلزُّجَاجَةُ كَأَنَّهَا كَوۡكَبٞ دُرِّيّٞ يُوقَدُ مِن شَجَرَةٖ مُّبَٰرَكَةٖ زَيۡتُونَةٖ لَّا شَرۡقِيَّةٖ وَلَا غَرۡبِيَّةٖ يَكَادُ زَيۡتُهَا يُضِيٓءُ وَلَوۡ لَمۡ تَمۡسَسۡهُ نَارٞۚ نُّورٌ عَلَىٰ نُورٖۚ يَهۡدِي ٱللَّهُ لِنُورِهِۦ مَن يَشَآءُۚ وَيَضۡرِبُ ٱللَّهُ ٱلۡأَمۡثَٰلَ لِلنَّاسِۗ وَٱللَّهُ بِكُلِّ شَيۡءٍ عَلِيمٞ ﴿٣٥﴾

**अल्लाह प्रकाश आहे आकाश आणि पृथ्वीचा. (१) त्याच्या प्रकाशाची उपमा, (त्या) एका मेहराबीची आहे, जिच्यांत एक दिवा असावा. आणि दिवा काचेच्या कंदिलात असावा. आणि कांच, चमकणाऱ्या ताऱ्याप्रमाणे प्रकाशमान असावा. तो दिवा एका आशीर्वादीत वृक्ष 'जैतून' च्या तेलाने जाळला जात असावा. जो वृक्ष न पूर्वेकडे आहे न पश्चिमेकडे. त्याचे तेल, असे वाटते की, स्वत:च प्रकाश देऊ लागेल. जरी त्याला अग्नीने स्पर्शही केला नसेल, प्रकाशावर प्रकाश आहे. (२) अल्लाहतआला आपल्या प्रकाशाकडे, ज्याला इच्छितो, (३) त्याला मार्गदर्शन करतो. लोकांच्या समजाविण्यासाठी, या उपमा, अल्लाहतआला सांगत आहे. (४) आणि अल्लाहतआला, प्रत्येक वस्तुंच्या स्थितीशी, चांगल्याप्रकारे माहितगार आहे. ३५**

فِي بُيُوتٍ أَذِنَ ٱللَّهُ أَن تُرۡفَعَ وَيُذۡكَرَ فِيهَا ٱسۡمُهُۥ يُسَبِّحُ لَهُۥ فِيهَا بِٱلۡغُدُوِّ وَٱلۡأٓصَالِ ﴿٣٦﴾

**त्या घरामध्ये ज्यांच्या मानसन्मानाचा, आणि अल्लाहतआलाचे नांव तेथे घेण्याचा, हुकूम आहे. (५) तेथे सकाळ संध्याकाळ, अल्लाहची पवित्रता वर्णन करीत असतात (६) ३६**

رِجَالٞ لَّا تُلۡهِيهِمۡ تِجَٰرَةٞ وَلَا بَيۡعٌ عَن ذِكۡرِ ٱللَّهِ وَإِقَامِ ٱلصَّلَوٰةِ وَإِيتَآءِ ٱلزَّكَوٰةِ يَخَافُونَ يَوۡمٗا تَتَقَلَّبُ فِيهِ ٱلۡقُلُوبُ وَٱلۡأَبۡصَٰرُ ﴿٣٧﴾

**असे लोक (७) ज्यांना व्यापार, आणि खरेदी विक्री, अल्लाहच्या स्मरणाकडून आणि नमाजीला कायम करणे, आणि जकात अदा करण्यापासून, गाफील करू शकत नाही त्या दिवसाला भितात, ज्या दिवशी पुष्कळशी अंत:करणे, आणि पुष्कळशे डोळे, उलटून जातील (८) ३७**

لِيَجۡزِيَهُمُ ٱللَّهُ أَحۡسَنَ مَا عَمِلُواْ وَيَزِيدَهُم مِّن فَضۡلِهِۦۗ وَٱللَّهُ يَرۡزُقُ مَن يَشَآءُ بِغَيۡرِ حِسَابٖ ﴿٣٨﴾

**या इराद्याने की, अल्लाहने त्यांना त्यांच्या कर्माचा उत्कृष्ट बदला द्यावा; किंबहुना आपल्या कृपेने, आणखी काही जास्त द्यावे. अल्लाहतआला ज्याला इच्छितो, त्याला बेसुमार रोजी देतो. (९) ३८**

وَٱلَّذِينَ كَفَرُوٓاْ أَعۡمَٰلُهُمۡ كَسَرَابِۭ بِقِيعَةٖ يَحۡسَبُهُ ٱلظَّمۡـَٔانُ مَآءً حَتَّىٰٓ إِذَا جَآءَهُۥ لَمۡ يَجِدۡهُ شَيۡـٔٗا وَوَجَدَ ٱللَّهَ عِندَهُۥ فَوَفَّىٰهُ حِسَابَهُۥۗ وَٱللَّهُ سَرِيعُ ٱلۡحِسَابِ ﴿٣٩﴾

**आणि काफिरांची कर्मे, त्या चमकणाऱ्या वाळूसारखी आहेत, जी सपाट मैदानांत असेल, जिला तहानलेला मनुष्य, पाणी समजतो; परंतु जेव्हा तिच्याजवळ पोहचतो, तर त्याला काहीच पावत नाही. होय! (परंतु) तो अल्लाहला आपल्या जवळ पावतो; जो त्याचा हिशेब पूर्ण पूर्ण चुकवून देतो. (१०) अल्लाहतआला घटक्या भरांत हिशेब करून देणारा आहे. ३९**

१) म्हणजे जर अल्लाह नसता तर न आकाशांत प्रकाश असता, न पृथ्वीवर. न आकाश व पृथ्वीत, कोणाच्या नशीबी हिदायत असती. फक्त तो अल्लाहतआलाच आकाश आणि पृथ्वीला प्रकाशमान करणारा आहे. त्याचे पुस्तक प्रकाश आहे. म्हणजे या दोघांच्या मार्फत, जीवनाच्या अंध:कारांत, मार्गदर्शक आणि प्रकाश मिळविला जातो. ज्याप्रमाणे दिवा आणि बल्बने, मनुष्य प्रकाश मिळवतो. हदीसने पण अल्लाहचा प्रकाश होणे सिद्ध आहे. ''बस ! अल्लाह, त्याची जात प्रकाश आहे. त्याचा पडदा प्रकाश आहे. आणि कित्येक उघड आणि वास्तीविक प्रकाशाचा निर्माता, त्याचा प्रदान करणारा, आणि त्याचेकडे हिदायत करणारा, फक्त एक अल्लाह आहे. ''वलकल हम्दु अनता नुरुस्समावाति वल अर्ज व मन फीहिन्न'' (अल्बुखारी व मुस्लिम)

२) म्हणजे ज्याप्रमाणे एका मेहेराबीत, असा दिवा असावा, जो कांचेच्या कंदिलात असावा; त्याच्यांत एका आशीर्वादीत झाडाचे एक खास तेल टाकले गेले असावे की,ते अग्नी (आग्काडी) दाखविल्याशिवाय स्वत:च प्रज्ज्वलीत होऊन जाण्याच्या जवळ असावे. अशाप्रकारे हे सर्व प्रकाश एका मेहेराबीत जमा होऊन गेले. आणि ती मेहेराब प्रकाशित होऊन गेली. अशाप्रकारे अल्लाहच्या अवतरीत केलेल्या प्रमाणांची स्थिती आहे; की, जे स्पष्टपण आहे, आणि एकाहून एक वरचढ. 'नूर अला नूर.' जो न पौर्वात्य आणि न पाश्र्चिमात्याचा आहे, अर्थ आहे, तो वृक्ष अशा खुल्या मैदानांत आणि वाळवंटात आहे की, त्यावर उन फक्त, सूर्य वर चढत असतांना, किंवा अस्ताच्या वेळीच पडत नाही; किंबहुना संबंध दिवस, उन्हांत रहातो. आणि अशा वृक्षांचे फळ फारच उत्कृष्ट असते. आणि याच्याने अभिप्रेत जैतुनाचा वृक्ष आहे. ज्याचे फळ आणि तेल शाक म्हणून पण वापरण्यांत येते. आणि दिव्यांत तेल म्हणून सुद्धा.

३) प्रकाशाने अभिप्रेत ईमान आणि ईस्लाम आहे; म्हणजे अल्लाहतआला ज्यांच्या ईमानाची आवड आणि आकांक्षा पाहतो, त्यांचे या प्रकाशाकडे मार्गदर्शन करून देतो. ज्यामुळे इहलोक आणि परलोकाच्या सद्‌भाग्याचे दरवाजे, त्यांच्यासाठी उघडून जातात.

४) ज्याप्रमाणे अल्लाहतआलाने हे उदाहरण सांगितले, ज्याच्यात, त्याने ईमानाला आणि आपल्या ईमानवाल्या सेवकाच्या मनांत त्याचे पक्के होणे, आणि सेवकांच्या अंत:करणाच्या स्थितीचे ज्ञान, ठेवण्याला स्पष्ट केले की, कोण हिदायतीला योग्य आहे, आणि कोण नाही?

५) जेव्हा अल्लाहतआलाने मोमिनच्या हृदयाला, आणि त्यांत जे ईमान, हिदायत आणि ज्ञान आहे. त्याला अशा दिव्याने उपमा दिली आहे, जो कांचेच्या कंदिलात असावा; आणि जो स्वच्छ निर्मल तेलाने प्रकाशित असावा. तर आता त्याचे घर सांगण्यात येत आहे. की हा कंदिल अशा घरांमध्ये आहे, ज्यांच्या बाबतीत हुकूम देण्यात आला आहे की त्यांना उंच बांधण्यात यावी. आणि त्याच्यांत अल्लाहचेच नाम स्मरण केले जावे. अभिप्रेत मशिदी आहेत ज्या, अल्लाहला जमिनीच्या हिश्श्यात, सर्वांत जास्त प्रिय आहेत. उंचीने अभिप्रेत, निव्वळ दगड आणि बांधकामाची उंची नाही, किंबहुना या मशिदींना, अस्वच्छता, निरर्थक गोष्टी, आणि अयोग्य म्हणणे, आणि कामे, यापासून पाकसाफ ठेवणे पण शामील आहे. नाही तर केवळ मशिदींच्या इमारतींना, आलीशान आणि गगनचुंबी बनवून देणे, वांच्छित नाही. किंबहुना हदीशीमध्ये, मशिदींना, सुवर्णाने सजविणे, जास्त सुशोभित, सजविलेली बनविणे, यापासून मना करण्यांत आले आहे. आणि एका हदीसमध्ये तर त्याला कयामतच्या जवळ येण्याच्या निशाण्यांमधून सांगण्यांत आले आहे. (अबुदाऊद)

याशिवाय ज्याप्रमाणे मशिदींमध्ये, व्यापार आणि व्यवहार आणि आरडा ओरड व गोंधळ, मना आहे; कारण की, हे मशिदीचा मूळ उद्देश्य, उपासनेच्या विरुद्ध आहे. याचप्रमाणे अल्लाहचे स्मरण करण्यांत, ही गोष्ट पण शामील आहे की फक्त एका अल्लाहचे स्मरण केले जावे, त्याचीच उपासना केली जावी, आणि त्यालाच मदतीसाठी बोलाविले जावे. ''मशिदी अल्लाहकरीता आहेत, बस! अल्लाहबरोबर कोणास बोलावू नका.'' (सू.जिन्न-१८)

६) तस्बीह ने अभिप्रेत नमाज आहे. आसाल, असीलचे अनेकवचन आहे, संध्याकाळच्या अर्थांत. म्हणजे ईमानवाले ज्यांची अंत:करणे, ईमान आणि हिदायतच्या प्रकाशाने, प्रकाशित असतात, सकाळ, संध्याकाळ, मशिदीमध्ये, अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी, नमाज पढतात, आणि त्याची उपासना करतात.

७) याच्याने आधार घेण्यांत आला आहे की, जरी स्त्रीयांचे मशिदीत जाऊन नमाज पढणे जाएज (योग्य) आहे, या अटीवर की, त्या फारच साध्या पोशाखांत, सुगंध लावल्याशिवाय, आणि परद्यासह जावे. ज्याप्रमाणे, रिसालते मआब, सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या काळांत, स्त्रीयां, मस्जिदे नबवीमध्ये, नमाजीसाठी हजर होत असत. तथापि त्यांच्यासाठी घरांत नमाज पढणे, जास्त उत्तम आणि श्रेष्ठ आहे. हदीसमध्ये सुद्धा या गोष्टीला सांगण्यांत आले आहे. (अबुदाऊद मुसनद अहमद २९७/६ व ३०१)

८) म्हणजे तिव्र भीतीमुळे आणि भयानकतेमुळे. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी आहे. ''यांना कयामतच्या दिवसापासून भिववा, ज्यादिवशी हृदये गळ्यापर्यंत येऊन लागतील, दु:खाने ओतप्रोत झालेले.'' (सू.मोमिन-१८) सुरवातीला मनाची ही स्थिति, सर्वांचीच होईल. मोमिनची पण आणि काफिराची पण.

९) कयामतच्या दिवशी ईमानवाल्यांना, त्यांच्या पुण्याचे प्रतिफल, ''अजआफन् मुजाअफतन'' (कित्येक पटी) च्या स्वरूपांत दिले जाईल. आणि पुष्कळांना हिशेबाशिवाय स्वर्गांत दाखल करून देण्यांत येईल. आणि तेथे रोजीची जी विपुलता आणि तिच्यांत, जे निरनिराळे प्रकार आणि लज्जती असतील, त्याचा तर काही अंदाजच करता येणार नाही.

१०) कर्मांनी अभिप्रेत ती कर्मे आहेत, ज्यांना काफिर आणि मुशरिक पुण्य समजून करत असतात. जसे दानधर्म, नातेवाईकांशी चांगली वागणूक, बैतुल्लाहचे बांधकाम, आणि हज्ज यात्रेकरूंची सेवा, वगैरे. सराब, त्या चमकणाऱ्या वाळूला म्हणतात, जी दुरून सूर्याच्या प्रकाश किरणांनी, पाण्यासारखी दिसते. (मृगजळ) सराब चा अर्थ चालण्याचा आहे. ती वाळू वहाणाऱ्या पाण्याप्रमाणे दिसते. 'किअतून' 'काईन' चे अनेक वचन आहे. जमिनीचा खोलगट भाग, ज्यांत पाणी सांचून जाते, किंवा सपाट मैदान. ही काफिरांच्या कर्मांची उपमा आहे. की ज्याप्रमाणे सराब (मृगजळ) दुरून पाण्यासारखे दिसते, वास्तविक ती वाळूच असते; अशाच प्रकारे काफिराची कर्मे, ईमान नसल्यामुळे अल्लाहच्या जवळ, बिल्कुल वजन विरहीत होतील. त्यांचा काही बदला (प्रतिफल) त्यांना मिळणार नाही. होय! जेव्हा तो अल्लाहच्या जवळ जाईल, तर अल्लाहला आपला प्रतिक्षित पावेल. जेथे तो त्याच्या कर्माचा पूर्ण हिशेब चुकवून टाकेल.

**किंवा त्या अंध:कारासारखा आहे, जो फारच खोल समुद्राच्या तळाशी असावा; ज्याला वरच्या खालच्या लाटांनी झांकून ठेवले असेल; मग वरून ढग आलेले असावे. म्हणजे अंध:कार आहेत, जे एका वरती एक आहे. जेव्हांआपला हात काढेल, तर त्याला पण जवळ जवळ पाहूंशकणार नाही.** [१] **आणि (गोष्ट ही आहे की,) ज्याला अल्लाहतआलाच प्रकाश देणारा नाही; त्याच्याजवळ कुठलाही प्रकाश असत नाही.** [२] ४०

أَوْ كَظُلُمَٰتٍ فِى بَحْرٍ لُّجِّىٍّ يَغْشَىٰهُ مَوْجٌ مِّن فَوْقِهِۦ مَوْجٌ مِّن فَوْقِهِۦ سَحَابٌ ۚ ظُلُمَٰتٌۢ بَعْضُهَا فَوْقَ بَعْضٍ إِذَآ أَخْرَجَ يَدَهُۥ لَمْ يَكَدْ يَرَىٰهَا ۗ وَمَن لَّمْ يَجْعَلِ ٱللَّهُ لَهُۥ نُورًا فَمَا لَهُۥ مِن نُّورٍ ﴿٤٠﴾

**काय आपण पाहिले नाही की, आकाश आणि पृथ्वीची सर्व सृष्टी, आणि पंख पसरून** [३] **उडणारे सर्व पक्षी, अल्लाहच्या पावित्र्य वर्णनांत व्यस्त आहे. प्रत्येकाला नमाज आणि त्याचे पावित्र्य वर्णन, ठाऊक**[४] **आहे. लोक जे काही करतात, त्याच्याशी अल्लाह चांगल्या प्रकारे वाकब आहे.** [५] ४१

أَلَمْ تَرَ أَنَّ ٱللَّهَ يُسَبِّحُ لَهُۥ مَن فِى ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلْأَرْضِ وَٱلطَّيْرُ صَٰٓفَّٰتٍ ۖ كُلٌّ قَدْ عَلِمَ صَلَاتَهُۥ وَتَسْبِيحَهُۥ ۗ وَٱللَّهُ عَلِيمٌۢ بِمَا يَفْعَلُونَ ﴿٤١﴾

**पृथ्वी आणि आकाशाची हुकुमत अल्लाहचीच आहे; आणि अल्लाहतआलाकडेच परतून जाणे आहे.** [६] ४२

وَلِلَّهِ مُلْكُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلْأَرْضِ ۖ وَإِلَى ٱللَّهِ ٱلْمَصِيرُ ﴿٤٢﴾

१) ही दुसरी उपमा आहे की, त्यांची कर्मे अंध:कारासारखी आहेत. म्हणजे त्यांना मृगजळाने उपमा देऊन घ्या, किंवा अंध:काराने. किंवा मागील उपमा काफिरांच्या कर्मांची होती. आणि ही त्याच्या कुफ्रची उपमा आहे. ज्यांत काफिर सर्व जीवनभर घेरलेला असतो. कुफ्र आणि आडमार्गी भटकण्याचा अंध:कार, पापकर्मे, आणि बहुदेववादी धारणेचा अंध:कार आणि अल्लाहकडून आणि त्याच्या परलोकातील शिक्षेकडून, अपरिचित असण्याचा अंध:कार, हे अंध:कार त्याला हिदायतच्या मार्गाकडे येऊन देत नाहीत. ज्याप्रमाणे मनुष्याला अंध:कारामध्ये आपला हात पण सूचत नाही.

२) म्हणजे ईहलोकात ईमान आणि इस्लामचा प्रकाश नशीबी नसतो. आणि परलोकात पण, ईमानवाल्यांना मिळणाऱ्या प्रकाशापासून, ते वंचित राहतील.

३) 'साफ्फातिन' चा अर्थ आहे, आपले पंख पसरवून. मनफिल्समावाती वल् अर्ज मध्ये, पक्षीपण शामील होते. परंतु येथे त्यांचा उल्लेख वेगळा केला; यासाठी की, पक्षी सर्व प्राण्यांमध्ये, एक फारच वेगळी सृष्टी आहे. जे अल्लाहच्या परिपूर्ण सामर्थ्याने, आकाश आणि पृथ्वीच्या दर्म्यान, वातावरणांत उडत राहून, अल्लाहचे पावित्र्य वर्णन करतात. ही सृष्टी उडण्यावर ही सामर्थ्य बाळगते, ज्यापासून दुसरे सर्व प्राणी वंचित् आहे, आणि जमिनीवर चालणाऱ्यावर पण सामर्थ्य ठेवते.

४) म्हणजे अल्लाहतआलाने प्रत्येक सृष्टीला, हे अंतर्गत ज्ञान आणि ही गोष्ट त्यांच्या मनामध्ये टाकली आहे की, अल्लाहचे पावित्र्य वर्णन कसे करावे? ज्याचा अर्थ हा आहे की, ही नशीबाची आणि योगायोगाची गोष्ट नाही; किंबहुना, आकाश आणि पृथ्वीतील, प्रत्येक वस्तुंचा, अल्लाहचे पावित्र्य वर्णन करणे, आणि नमाज पढणे, हे पण अल्लाहच्या सामर्थ्याचे एक द्योतक आहे. ज्याप्रमाणे त्यांची निर्मिती, अल्लाहची एक, अनोखी कारागीरी आहे. ज्यावर अल्लाहशिवाय कोणी समर्थ नाही.

५) म्हणजे जमीनवाले आणि आकाशवाले ज्याप्रमाणे अल्लाहचे आज्ञापालन, आणि त्याचे पावित्र्य वर्णन करतात, सर्व त्याच्या ज्ञानांत आहे. ही जणू मानवांना आणि जिन्नातांना तंबी आहे की, तुम्हांस अल्लाहने समज, आणि इराद्याचे स्वातंत्र्य दिले आहे. तर तुम्हांस तर दुसऱ्या सृष्टीपेक्षा जास्त, अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्तुती, आणि त्याचे आज्ञापालन करावयास पाहिजे. परंतु मामला याच्या उलट आहे. दुसरी सृष्टी तर अल्लाहच्या पावित्र्य वर्णनांत व्यस्त आहे. परंतु समज आणि इराद्याने संपन्न सृष्टी, याच्यात कोताई करीत आहे. ज्यावर खचित्च ती अल्लाहच्या पकडीला पात्र ठरेन.

६) बस ! तोच खरा अधिकारी आहे. ज्याच्या हुकुमाचा कोणी अनादर करणारा नाही. आणि तोच खरा खुरा उपास्य आहे. ज्याच्याशिवाय कोणाची उपासना योग्य नाही. त्याच्याचकडे सर्वांना परतून जाणे आहे. जेथे तो प्रत्येकाच्या बाबतीत, न्यायाप्रमाणे निर्णय करीन.

أَلَمْ تَرَ أَنَّ اللَّهَ يُزْجِي سَحَابًا ثُمَّ يُؤَلِّفُ بَيْنَهُ ثُمَّ يَجْعَلُهُ رُكَامًا فَتَرَى الْوَدْقَ يَخْرُجُ مِنْ خِلَالِهِ ج وَيُنَزِّلُ مِنَ السَّمَاءِ مِنْ جِبَالٍ فِيهَا مِنْ بَرَدٍ فَيُصِيبُ بِهِ مَنْ يَشَاءُ وَيَصْرِفُهُ عَنْ مَنْ يَشَاءُ ط يَكَادُ سَنَا بَرْقِهِ يَذْهَبُ بِالْأَبْصَارِ ﴿٤٣﴾

**काय आपण पाहिले नाही की अल्लाहतआला ढगांना चालवितो, मग त्यांना (आपसांत) मिळवून देतो. मग त्यांना एकावर एक करून देतो, मग आपण पाहतात की, त्यांच्यामधून पाऊस पाडतो; आणि तोच आकाशाकडून, गारांच्या पर्वतातून, गारा वर्षवितो; [१] मग ज्यांच्याजवळ इच्छितो, त्यांच्याजवळ यांना वर्षवितो. आणि ज्यांच्यावरून इच्छितो, त्यांच्यावरून त्यांना हटवून देतो. [२] ढगांतूनच निघणाऱ्या विजेची चमक, अशी दिसते की, जणू आता डोळ्यांचे तेज हिरावून नेते. [३] ४३**

يُقَلِّبُ اللَّهُ اللَّيْلَ وَالنَّهَارَ ط إِنَّ فِي ذَٰلِكَ لَعِبْرَةً لِأُولِي الْأَبْصَارِ ﴿٤٤﴾

**अल्लाहतआलाच दिवस आणि रात्रींत फेरबदल करीत असतो. [४] दृष्टी ठेवणाऱ्यांना तर याच्यांत फारच मोठा धडा आहे. ४४**

وَاللَّهُ خَلَقَ كُلَّ دَابَّةٍ مِنْ مَاءٍ ج فَمِنْهُمْ مَنْ يَمْشِي عَلَىٰ بَطْنِهِ ج وَمِنْهُمْ مَنْ يَمْشِي عَلَىٰ رِجْلَيْنِ ج وَمِنْهُمْ مَنْ يَمْشِي عَلَىٰ أَرْبَعٍ ط يَخْلُقُ اللَّهُ مَا يَشَاءُ ط إِنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٤٥﴾

**आणि सर्वच्या सर्व चालणाऱ्या फिरणाऱ्या प्राण्यांना अल्लाहतआलानेच पाण्यापासून निर्माण केले आहे. त्यांच्यातून काही तर आपल्या पोटावर [५] चालतात. काही दोन पायावर चालतात, [६] काही चार पायांवर चालतात; [७] अल्लाहतआला जे इच्छितो निर्माण करतो. [८] नि:संशय अल्लाहतआला सर्व सामर्थवान आहे. ४५**

لَقَدْ أَنْزَلْنَا آيَاتٍ مُبَيِّنَاتٍ ط وَاللَّهُ يَهْدِي مَنْ يَشَاءُ إِلَىٰ صِرَاطٍ مُسْتَقِيمٍ ﴿٤٦﴾

**नि:संशय आम्हीच तेजस्वी आणि स्पष्ट महावाक्ये, अवतरीत केली आहेत. अल्लाहतआला ज्याला इच्छितो, त्याला सरळ मार्ग दाखवून देतो. [९] ४६**

१) याचा एक अर्थ हा आहे, जो भाषांतरांत अंगिकारला गेला आहे, की आकाशांत गारांचे पर्वतासारखे ढीग आहेत, ज्यांतून तो गारा वर्षवितो. (इब्ने कसीर) दुसरा अर्थ हा सांगितला गेला आहे की, आकाश, उंचीच्या अर्थांत आहे. आणि पर्वताचा अर्थ आहे. मोठे मोठे तुकडे, पर्वतांसारखे. म्हणजे अल्लाहतआला आकाशातून पाऊसच पाडीत नाही, परंतु उंचीवरून, जेव्हा इच्छितो, बर्फाचे तुकडे तुकडे पण वर्षवितो. (फत्हुल कदीर) किंवा पर्वतांसारख्या मोठ्या ढगांतून गारापण वर्षवितो.

२) म्हणजे गारा आणि पाऊस, रहमत म्हणून, ज्यांना इच्छितो, त्यांना पोहचवितो आणि ज्यांना इच्छितो, त्यांना वंचित् ठेवतो. किंवा हा अर्थ आहे की, गारांच्या वर्षावाच्या शिक्षेत, ज्यांना इच्छितो त्यांना व्यस्त करून देतो, ज्याच्याने त्यांची पिके आणि शेत्या बर्बाद होऊन जातात; आणि ज्यांच्यावर आपली दया करू इच्छितो, त्यांना यापासून वांचवून घेतो.

३) म्हणजे ढगांत चमकणारी वीज; जी सर्वसाधारणपणे पावसाची, मनाला खुषखबर देणारी असते. हिच्यांत एवढी तीव्र चमक असते. की, ती जणू डोळ्यांची दृष्टी हिरावून घेण्यासारखी असते. हा पण त्याच्या कारागरीचा एक नमुना आहे.

४) म्हणजे कधी दिवस मोठे, रात्री लहान; आणि कधी याच्या उलट. किंवा कधी दिवसाच्या प्रकाशाला, ढगांच्या अंधारांनी, आणि रात्रीच्या अंधाराला, चांदण्याच्या प्रकाशाने, बदलून देतो.

५) ज्याप्रमाणे सर्प, मासे आणि दुसरे जमिनीवर सरपटणारे किडेमकोडे आहेत.

६) जशी मनुष्ये आणि पक्षी.

७) जसे सर्व चतुष्पाद आणि दुसरे जंगली श्वापदे आहेत.

८) हा इशारा आहे या गोष्टीकडे, की काही जंगली जीव अशीपण आहेत, ज्यांना चारपेक्षा जास्त पाय असतात. जसे खेकडा, कोळी आणि पुष्कळशे जमिनीवर सरपटणारे किडे.

९) 'आयात मुबय्यनात' ने अभिप्रेत, कुरआन करीम आहे. ज्यात प्रत्येक त्या गोष्टीचा उल्लेख आहे, ज्याचा संबंध माणसाच्या धर्म आणि चारित्र्याशी आहे. ज्यावर त्याचे साफल्य आणि सद्‌भाग्याची दारोमदार आहे. ''मा फर्रतना फील किताबी मिन शय्ईन'' (सू.अन्आम-३८) ''आम्ही पुस्तकांत कोणत्या गोष्टीच्या वर्णन करण्यांत, कोताई केली नाही.'' ज्याला हिदायत मिळावयाची असते, अल्लाहतआला त्याला योग्य दृष्टी आणि खरे अंत:करण, प्रदान करून देतो. ज्यामुळे त्याच्यासाठी हिदायतचा मार्ग प्रशस्त होऊन जातो. सरळ मार्गाने अभिप्रेत हाच हिदायतचा मार्ग आहे; ज्यांत काही वक्रता नाही. त्याला अंगीकारून, मनुष्य आपल्या ध्येयाप्रत, स्वर्गात पोहचून जातो.

وَيَقُوْلُوْنَ اٰمَنَّا بِاللّٰهِ وَبِالرَّسُوْلِ وَاَطَعْنَا ثُمَّ يَتَوَلّٰى فَرِيْقٌ مِّنْهُمْ مِّنْۢ بَعْدِ ذٰلِكَ ۭ وَمَآ اُولٰۗىِٕكَ بِالْمُؤْمِنِيْنَ ﴿٤٧﴾

आणि (ते) म्हणतात की, आम्ही अल्लाहतआला आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणले, आणि आज्ञाधारक झालो. मग त्यांच्यातून एक समूह, याच्यानंतर सुद्धा फिरून जातो. हे ईमानवाले नव्हतेच[१] (४७)

وَاِذَا دُعُوْٓا اِلَى اللّٰهِ وَرَسُوْلِهٖ لِيَحْكُمَ بَيْنَهُمْ اِذَا فَرِيْقٌ مِّنْهُمْ مُّعْرِضُوْنَ ﴿٤٨﴾

आणि जेव्हा यांना या गोष्टीकडे बोलाविले जाते की, अल्लाह आणि त्याचा पैगंबर, यांनी त्यांच्या झगड्यांत न्याय चुकवावा. तरी सुद्धा त्यांच्यातून एक पक्ष तोंड फिरवणारा बनून जातो. (४८)

وَاِنْ يَّكُنْ لَّهُمُ الْحَقُّ يَاْتُوْٓا اِلَيْهِ مُذْعِنِيْنَ ﴿٤٩﴾

हां! जर सत्य त्यांच्या बाजूला असेल, तर ते आज्ञाधारक बनून, त्याच्याकडे चालले येतात.[२] (४९)

اَفِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ اَمِ ارْتَابُوْٓا اَمْ يَخَافُوْنَ اَنْ يَّحِيْفَ اللّٰهُ عَلَيْهِمْ وَرَسُوْلُهٗ ۭ بَلْ اُولٰۗىِٕكَ هُمُ الظّٰلِمُوْنَ ﴿٥٠﴾

काय त्यांच्या मनांत रोग आहे? किंवा ते शंका कुशंकेत पडलेले आहेत? किंवा त्यांना या गोष्टीची भीती आहे की, अल्लाहतआला आणि त्याचा पैगंबर, त्यांचा हक्क मारून बसतील? गोष्ट अशी आहे की, हे लोक, स्वत:च मोठे अन्यायी आहेत[३] (५०)

اِنَّمَا كَانَ قَوْلَ الْمُؤْمِنِيْنَ اِذَا دُعُوْٓا اِلَى اللّٰهِ وَرَسُوْلِهٖ لِيَحْكُمَ بَيْنَهُمْ اَنْ يَّقُوْلُوْا سَمِعْنَا وَاَطَعْنَا ۭ وَاُولٰۗىِٕكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ﴿٥١﴾

मुसलमानांचे म्हणणे तर हे आहे की, जेव्हा त्यांना यासाठी बोलाविले जाते की, अल्लाह आणि त्याचा पैगंबर, यांनी त्यांच्यात निर्णय करून द्यावा, तर हे म्हणतात आम्ही ऐकले आणि मान्य केले.[४] हेच लोक सफल होणारे आहेत (५१)

وَمَنْ يُّطِعِ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ وَيَخْشَ اللّٰهَ وَيَتَّقْهِ فَاُولٰۗىِٕكَ هُمُ الْفَاۗىِٕزُوْنَ ﴿٥٢﴾

आणि जो पण अल्लाहतआलाचे आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करेन, ईशभय बाळगील, आणि त्याच्या शिक्षेकडून भीत राहील, तोच सफल होणारा आहे.[५] (५२)

१) हे दांभिकांचे वर्णन आहे. जे जिभेने ईस्लाम व्यक्त करीत होते, परंतु त्यांच्या मनांत कुफ्र (नकार) आणि मत्सर होता. म्हणजे खऱ्या धारणेपासून वंचित् होते. म्हणून जिभेने ईमान जाहीर करून सुद्धा, त्यांच्यात ईमान नसल्याचे सांगितले गेले.

२) कारण की त्यांना खात्री असते की, नबी ﷺ च्या न्यायालयांत, जो निर्णय देण्यात येईल. त्याच्यात कोणाचा तोंड देखलेपणा होणार नाही. यासाठी तेथे आपली फिर्याद घेऊन जाण्यापासून टाळाटाळ करतात. परंतु जर ते जाणतात की, फिर्यादीत ते सत्त्यावर आहेत, आणि त्यांच्याच बाजूने निर्णय होण्याची प्रबळ शक्यता आहे, तर मग आनंदाने तेथे येतात. 'इज्‌आन' चा अर्थ होतो मान्य करणे, आज्ञाधारक होणे आणि आज्ञापालन करणे.

३) जेव्हा निर्णय यांच्या विरूद्ध होण्याची शक्यता असते; तेव्हा यापासून विन्मुख होण्याचे आणि पळ काढण्याचे कारण सांगण्यांत येत आहे की, एक तर त्यांच्या मनांत कुफ्र आणि दांभिकतेचा रोग आहे. किंवा त्यांना मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या पैगंबरी मध्ये शंका आहे. किंवा त्यांना या गोष्टीचे भय आहे की, त्यांच्यावर अल्लाह आणि त्याचा पैगंबर जुलूम करतील. वास्तविक यांच्या कडून जुलूम होण्याची अजीबात शक्यताच नाही; किंबहुना खरी गोष्ट ही आहे की, ते स्वत:च जालीम आहेत. इमाम शौकानी म्हणतात की, जेव्हा न्याय निवाड्यासाठी अशा अधिकारी आणि काझीकडे बोलाविले जाईल, जो न्यायप्रिय आणि कुरआन आणि सुन्नतचा ज्ञानी असेल, तर त्याच्याजवळ जाणे आवश्यक आहे. तथापि जर तो काझी, कुरआन आणि सुन्नतच्या ज्ञान आणि त्यांच्या प्रमाणांकडून अज्ञानांत असेल त्याच्या जवळ निर्णयासाठी जाणे आवश्यक नाही.

४) हे कुफ्र आणि निफाक (दांभिकत्व) च्या तुलनेत, ईमानवाल्यांचे, कर्तृत्व आणि कर्म, यांचे वर्णन आहे.

५) म्हणजे साफल्य आणि यशाला पात्र फक्त ते लोक असतील, जे आपल्या सर्व मामल्यांत, अल्लाह व रसूलच्या निर्णयाला प्रसन्न मनाने मान्य करतात, आणि त्यांचेच आज्ञापालन करतात. आणि अल्लाहच्या भयाने संपन्न आहेत, न की, दुसरे लोक; जे या वैशिष्टयांपासून वंचित आहेत.

وَاَقْسَمُوْا بِاللّٰهِ جَهْدَ اَيْمَانِهِمْ لَئِنْ اَمَرْتَهُمْ لَيَخْرُجُنَّ ؕ قُلْ لَّا تُقْسِمُوْا ۚ طَاعَةٌ مَّعْرُوْفَةٌ ؕ اِنَّ اللّٰهَ خَبِيْرٌۢ بِمَا تَعْمَلُوْنَ ﴿٥٣﴾

आणि ते अल्लाहतआलाच्या कडकडीत शपथा खाऊन म्हणतात[१] की, आपला हुकूम होताच, निघून उभे राहतील. आपण सांगून द्या की, (पुरे झाले,) शपथा खाऊ नका. तुमच्या आज्ञापालनाची हकीकत ठाऊक आहे[२] जे काही तुम्ही करीत आहांत अल्लाहतआला ते सर्व जाणतो[३] (५३)

قُلْ اَطِيْعُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوا الرَّسُوْلَ ۚ فَاِنْ تَوَلَّوْا فَاِنَّمَا عَلَيْهِ مَا حُمِّلَ وَعَلَيْكُمْ مَّا حُمِّلْتُمْ ؕ وَاِنْ تُطِيْعُوْهُ تَهْتَدُوْا ؕ وَمَا عَلَى الرَّسُوْلِ اِلَّا الْبَلٰغُ الْمُبِيْنُ ﴿٥٤﴾

(आपण) सांगून टाका की, अल्लाहतआलाची आज्ञा पाळा, रसूलुल्लाह (सल्ल.) चे आज्ञापालन करा; तरी सुद्धा तुम्ही विन्मुख झालात, तर पैगंबरावर फक्त तेवढेच आहे, जे त्याच्यावर आवश्यक केले गेले आहे;[४] आणि तुम्हावर याचे उत्तरदायित्व आहे, जे तुम्हावर ठेवले आहे. हिदायत[५] तर तुम्हांस त्याच वेळी मिळेल, जेव्हा तुम्ही पैगंबराच्या आधीन व्हाल.[६] ऐका! पैगंबरावर तर फक्त पोहचून देण्याची,[७] जबाबदारी आहे. (५४)

وَعَدَ اللّٰهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا مِنْكُمْ وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَيَسْتَخْلِفَنَّهُمْ فِى الْاَرْضِ كَمَا اسْتَخْلَفَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ ۪ وَلَيُمَكِّنَنَّ لَهُمْ دِيْنَهُمُ الَّذِى ارْتَضٰى لَهُمْ وَلَيُبَدِّلَنَّهُمْ مِّنْۢ بَعْدِ خَوْفِهِمْ اَمْنًا ؕ يَعْبُدُوْنَنِىْ لَا يُشْرِكُوْنَ بِىْ شَيْئًا ؕ وَمَنْ كَفَرَ بَعْدَ ذٰلِكَ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْفٰسِقُوْنَ ﴿٥٥﴾

आणि तुमच्यातून त्या लोकांशी, ज्यांनी ईमान आणले आहे, आणि चांगली कामे केली आहेत, अल्लाहतआला वायदा करून चुकला आहे, की त्यांना अवश्य देशाचा सत्ताधारी बनवीन; जसे की या लोकांना सत्ताधारी बनविले होते, जे यांच्या पूर्वी होते. आणि खचित्च त्यांच्या करता, त्यांच्या या धर्माला मजबुती बरोबर, जमवून देईल; ज्याला यांच्यासाठी त्याने पसंत ठरवून टाकले आहे. आणि त्यांच्या या भीती आणि धोक्याला, सुख शांतीत बदलून देईल.[८] ते माझी (च) उपासना करतील, माझ्याबरोबर कोणालाही सरकतदार ठरविणार नाही.[९] याच्यानंतर सुद्धा जे लोक कृतघ्नता करतील आणि कुफ्र करतील, ते खचित्च आज्ञाभंजक आहेत[१०] (५५)

وَاَقِيْمُوا الصَّلٰوةَ وَاٰتُوا الزَّكٰوةَ وَاَطِيْعُوا الرَّسُوْلَ لَعَلَّكُمْ تُرْحَمُوْنَ ﴿٥٦﴾

आणि नमाजीला कायम करा, जकात देत रहा, आणि अल्लाहतआलाच्या पैगंबराच्या आज्ञापालनांत लागून रहा, कारण की तुमच्यावर दया केली जावी.[११] (५६)

ع ٧ / ١٣

لَا تَحْسَبَنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا مُعْجِزِيْنَ فِى الْاَرْضِ ۚ وَمَاْوٰىهُمُ النَّارُ ؕ وَلَبِئْسَ الْمَصِيْرُ ﴿٥٧﴾

हा विचार आपण कधीही करू नका, की नाकारणारे लोक, जमिनीत (इकडे तिकडे पळून) आम्हास हरवून देणार आहेत.[१२] त्यांचे खरे ठिकाण तर नरकाग्नी आहे, जे खचित्च फारच वाईट ठिकाण आहे. (५७)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لِيَسْتَاْذِنْكُمُ الَّذِيْنَ مَلَكَتْ اَيْمَانُكُمْ وَالَّذِيْنَ لَمْ يَبْلُغُوا الْحُلُمَ مِنْكُمْ ثَلٰثَ مَرّٰتٍ ؕ مِنْ قَبْلِ صَلٰوةِ الْفَجْرِ وَحِيْنَ تَضَعُوْنَ ثِيَابَكُمْ مِّنَ الظَّهِيْرَةِ وَمِنْۢ بَعْدِ صَلٰوةِ الْعِشَآءِ ۫ؕ ثَلٰثُ عَوْرٰتٍ لَّكُمْ ؕ لَيْسَ عَلَيْكُمْ وَلَا عَلَيْهِمْ جُنَاحٌۢ بَعْدَهُنَّ ؕ طَوّٰفُوْنَ عَلَيْكُمْ بَعْضُكُمْ عَلٰى بَعْضٍ ؕ كَذٰلِكَ يُبَيِّنُ اللّٰهُ لَكُمُ الْاٰيٰتِ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌ حَكِيْمٌ ﴿٥٨﴾

अहो ईमानवाल्यांनो! तुमच्याकडून तुमच्या स्वामित्वांत असलेल्या गुलामांना, आणि त्यांना सुद्धा जे अजून तारूण्याला पोहचले नसतील, (आपल्या येण्याची) तीन वेळांमध्ये, परवानगी मिळविणे आवश्यक आहे. सकाळच्या नमाजीच्यापूर्वी, आणि जोहरच्या वेळी, जेव्हांकी तुम्ही आपले कपडे उतारून ठेवतात; आणि ईशाच्या नमाजीनंतर;[१३] हे तिन्ही वेळा तुमच्या एकांताचे आणि परद्याचे आहेत.[१४] या वेळेशिवाय, न तर तुमच्यावर काही गुनाह आहे न त्यांच्यावर.[१५] तुम्ही सर्व आपसांत, एक दुसऱ्याजवळ, भरपूर येणारे जाणारे आहांतच.[१६] अल्लाह अशाप्रकारे आपले आदेश, तुम्हास उघड उघड करून, सांगत आहे. अल्लाहतआला पूर्ण ज्ञानी आणि पूर्ण बुद्धीमान आहे. (५८)

१) अर्थ हा आहे की, आपल्या क्षमतेनुसार, शपथा खाऊन म्हणत आहेत.

२) आणि ते हे आहे की, ज्याप्रमाणे तुम्ही खोट्या शपथा खातात, तुमचे आज्ञापालन पण दांभिकतेवर आधारित आहे. काहींनी हा अर्थ केला आहे, की, तुमचा मामला, पुण्याच्या पालनाचा असावयास पाहिजे. म्हणजे पुण्यांत, कुठल्याही शपथेशिवाय, कराराचे पालन, ज्याप्रमाणे मुसलमान करतात; बस! तुम्हीपण त्यांच्यासारखे होऊन जा. (इब्ने कसीर)

३) म्हणजे तो तुमच्या सर्व परिस्थितीशी वाकबगार आहे. कोण आज्ञापालक आहे आणि कोण आज्ञाभंजक? फक्त शपथ वाहून, आज्ञापालनाचे प्रदर्शन करण्याने, जेव्हांकी, तुमची मने याच्या विरूद्ध असावीत; तुम्ही अल्लाहला धोका देऊं शकत नाही. कारण की तो गुप्तहून गुप्त गोष्टीला पण जाणणारा आहे. आणि तो तुमच्या मनांत अस्तित्वात असलेल्या रहस्यभेदांना पण जाणतो; जरी तुम्ही जिभेने, याच्या विरूद्ध जाहीर कराल.

४) म्हणजे प्रचार आणि आवाहन, जे तो करीत आहे.
५) म्हणजे त्याच्या आवाहनाला मान्य करून, अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणणे, आणि त्यांचे आज्ञापालन करणे.
६) यासाठी की, तो सरळ मार्गाकडे आमंत्रण देत आहे.
७) कोणी त्याच्या आमंत्रणाचा स्वीकार करो अथवा न करो, ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''हे पैगंबरा! तुझे काम फक्त आमचे आदेश पोहचवून देणे आहे. (कोणी मान्य करतो अथवा नाही) हा हिशेब घेणे, आमची जबाबदारी आहे.'' (सू.रअद-४०)
८) काहींनी अल्लाहतआलाच्या या वायद्याला, सहाबा करामच्या बरोबर किंवा खुलफा-ए-राशिदीनच्या बरोबर, खास ठरविले आहे. परंतु याच्या खास करण्याचे काही प्रमाण नाही. कुरआनाचे शब्द सर्वांसाठी आहेत. आणि ईमान आणि चांगली कामे करण्याशी सशर्त आहेत. तथापि ही गोष्ट जरूर आहे की, खिलाफते राशदाच्या काळांत, आणि सहाबांच्या काळांत, अल्लाहतआलाच्या या वायद्याचे दर्शन झाले. अल्लाहतआलाने, मुसलमानांना भूमीमध्ये प्राबल्य दिले. आपल्या आवडत्या धर्म इस्लामला उर्जितावस्था दिली. आणि मुसलमानांच्या भीतीला अभयांत बदलून दिले. पहिले मुसलमान, अरब काफिरांशी भीत असत; मग याच्याविरूद्ध मामला होऊन गेला. नबी ﷺ नी पण ज्या भविष्यवाण्या केल्या होत्या, त्या पण या काळांत पूर्ण झाल्यांत. उदाहरणार्थ आपण ﷺ नी सांगितले होते, ''हैरा' हून एक स्त्री एकटी चालेल, आणि बैतुल्लाहला येऊन, तवाफ करेल; तिला काही भय आण धोका राहणार नाही. किसराचे खजीने तुमच्या पावलांवर येऊन पडतील'' आणि झालेही तसेच (स.बुखारी) नबी ﷺ नी हे पण सांगितले होते, ''अल्लाहतआलाने जमिनीला माझ्यासाठी आकुंचित करून दिले. मग मी तिचे पूर्वीय आणि पश्चिमी भाग पाहिले. लवकरच माझ्या उम्मतीचे सत्तेचे वर्तूळ, तेथ पर्यंत पोहोचेल, जेथपर्यंत जमीन माझ्यासाठी, आंकुचित करून दिली गेली. (स.मुस्लिम) सत्तेची ही विशालता पण मुसलमानांच्या वाट्यांला आली व इराण आणि सीरिया, इजिप्त आणि अफ्रिका आणि दुसरे लांबवरचे देश, जिंकले गेलेत. आणि कुफ्र व शिर्कच्या जागी, एकेश्वरवाद आणि सुन्नतच्या मशाली, प्रत्येक ठिकाणी प्रज्ज्वलीत झाल्यांत. आणि इस्लामी शिष्टाचार विश्वाच्या सहाव्या भागांत पोहचून गेला. परंतु हा वायदा सशर्त होता, जेव्हा मुसलमान ईमानामध्ये दुर्बल आणि चांगली कामे करण्यात कोताही करू लागले, तेव्हा अल्लाहतआलाने त्यांच्या प्रतिष्ठेला अपमानांमध्ये, त्यांच्या सत्ता आणि प्राबल्याला गुलामीमध्ये, आणि त्यांच्या अभयाला भीतीमध्ये बदलून दिले.
९) ही पण ईमान आणि चांगल्या कामांबरोबर एक आणखी मूळ शर्त आहे, ज्यामुळे मुसलमान, अल्लाहच्या मदतीला पात्र आणि या एकेश्वरवादाच्या खुबीपासून खाली होऊन गेल्यानंतर, अल्लाहच्या मदतीपासून वंचित होऊन जातील.
१०) या कुफ्रने अभिप्रेत, तेच ईमान आणि चांगली कामे आणि एकेश्वरवादापासून वंचित होणे आहे. ज्यानंतर एक मनुष्य अल्लाहच्या आज्ञापालनातून निघून जातो. आणि कुफ्र आणि आज्ञाभंजनाच्या वर्तुळात, दाखल होऊन जातो.
११) ही जणु मुसलमानांना ताकीद केली गेली की, अल्लाहची रहमत आणि मदत प्राप्त करण्याचा मार्ग हाच आहे, ज्यावर चालून, सहाबा करामला ही रहमत आणि मदत प्राप्त झाली.
१२) म्हणजे आपले विरोधक, आणि आपल्याला खोटे ठरविणारे, अल्लाहला हताश करूंशकत नाही; किंबहुना अल्लाहतआला, त्यांची पकड करण्याला हर प्रकारे समर्थ आहे.
१३) गुलामांनी अभिप्रेत, दास आणि दासी दोन्हीही अभिप्रेत आहेत. 'सलासा मर्रात' चा अर्थ तीन वेळा आहेत. या तिन्ही वेळा अशा आहेत, की मनुष्य घरांत, आपल्या पत्नीसोबत, खास कामांत व्यस्त, किंवा अशा पोशाखांत असूंशकतो, की, याच्यांत, कोणाला याचे पहाणे, योग्य ठीक नाही. म्हणून या तीन वेळांत, घरांत त्या सेवकांना, या गोष्टीची परवानगी घेतल्याशिवाय त्यांनी घरांत प्रवेश न करावा.
१४) 'अवरात' 'अवरतून' चे अनेकवचन आहे. ज्याचा मूळ अर्थ, वाईट आणि दोष आहे. मग याचा उपयोग अशा गोष्टींवर केला जाऊ लागला, ज्यांचे जाहीर करणे आणि त्यांचे पहाणे, पसंत नसावे. 'खातून' ला पण यासाठी 'औरत' म्हटले जाते की, तिचे जाहीर आणि वस्त्रहिन होणे, आणि पहाणे धर्मशास्त्राच्या दृष्टीने नापसंत आहे. तेथे चर्चित तीन वेळांना 'अवरात' म्हणण्यांत आले आहे. म्हणजे या तुमच्या परदा आणि एकांताच्या वेळाआहेत. ज्यांत तुम्ही आपले खास पोशाख, आणि आपल्या अवस्थेला जाहीर करणे, पसंत करीत नाहीत.
१५) म्हणजे या तीन वेळांशिवाय, घरांतील चर्चित सेवकांना, या गोष्टीची परवानगी आहे की, त्यांनी परवानगी घेतल्याशिवाय, घरांत येऊ जाऊ शकतात.
१६) हे तेच कारण आहे, जे हदीसमध्ये मांजराला पाक होण्यासाठी सांगण्यात आले आहे. ''मांजर नापाक नाही, यासाठी की ते वारंवार तुमच्याजवळ (घरांत) येणारे जाणारे आहे.'' (अबुदाऊद,तिर्मिझी) सेवक आणि मालक, यांना पण आपसांत नेहमी, एक दुसऱ्याला भेटण्याची आवश्यकता पडते. याच सर्वसाधारण आवश्यकतेपोटी, अल्लाहने ही परवानगी देऊन टाकली; कारण की तो ज्ञानी आहे. लोकांच्या गरजा आणि इच्छांना तो जाणतो. आणि बुद्धीमान आहे, त्याच्या प्रत्येक हुकूमांत, आपल्या भक्तांचे फायदे, आणि प्रयोजने आहेत.

وَإِذَا بَلَغَ الْأَطْفَالُ مِنكُمُ الْحُلُمَ فَلْيَسْتَأْذِنُوا كَمَا اسْتَأْذَنَ الَّذِينَ مِن قَبْلِهِمْ ۚ كَذَٰلِكَ يُبَيِّنُ اللَّهُ لَكُمْ آيَاتِهِ ۗ وَاللَّهُ عَلِيمٌ حَكِيمٌ ﴿٥٩﴾

आणि तुमच्यातील मुले सुद्धा, जेंव्हा पूर्ण वयास पोहचून जातील, तर ज्याप्रमाणे, त्यांच्या पूर्वीची माणसे, परवानगी मागत असतात, त्यांना पण परवानगी घेऊन यावयांस पाहिजे.[१] अल्लाहतआला तुमच्याशी अशा प्रकारे आपली महावाक्ये (स्पष्ट) करून सांगत आहे. अल्लाहतआलाच ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. (५९)

وَالْقَوَاعِدُ مِنَ النِّسَاءِ اللَّاتِي لَا يَرْجُونَ نِكَاحًا فَلَيْسَ عَلَيْهِنَّ جُنَاحٌ أَن يَضَعْنَ ثِيَابَهُنَّ غَيْرَ مُتَبَرِّجَاتٍ بِزِينَةٍ ۖ وَأَن يَسْتَعْفِفْنَ خَيْرٌ لَّهُنَّ ۗ وَاللَّهُ سَمِيعٌ عَلِيمٌ ﴿٦٠﴾

आणि फार मोठ्या वृद्ध स्त्रिया, ज्यांना लग्नाची आशा आणि इच्छाच राहिली नसेल, त्या जर आपले कपडे उतारून ठेवतील, तर त्यांच्यावर काही गुनाह नाही; या अटीवर की त्या आपला बनाव शृंगार जाहीर करणाऱ्या नसाव्यांत,[२] तथापि जर या विषयी त्या जपत राहतील, तर त्यांच्यासाठी फार उत्तम[३] आहे. आणि अल्लाहतआला ऐकणारा आणि जाणणारा आहे. (६०)

لَّيْسَ عَلَى الْأَعْمَىٰ حَرَجٌ وَلَا عَلَى الْأَعْرَجِ حَرَجٌ وَلَا عَلَى الْمَرِيضِ حَرَجٌ وَلَا عَلَىٰ أَنفُسِكُمْ أَن تَأْكُلُوا مِن بُيُوتِكُمْ أَوْ بُيُوتِ آبَائِكُمْ أَوْ بُيُوتِ أُمَّهَاتِكُمْ أَوْ بُيُوتِ إِخْوَانِكُمْ أَوْ بُيُوتِ أَخَوَاتِكُمْ أَوْ بُيُوتِ أَعْمَامِكُمْ أَوْ بُيُوتِ عَمَّاتِكُمْ أَوْ بُيُوتِ أَخْوَالِكُمْ أَوْ بُيُوتِ خَالَاتِكُمْ أَوْ مَا مَلَكْتُم مَّفَاتِحَهُ أَوْ صَدِيقِكُمْ ۚ لَيْسَ عَلَيْكُمْ جُنَاحٌ أَن تَأْكُلُوا جَمِيعًا أَوْ أَشْتَاتًا ۚ فَإِذَا دَخَلْتُم بُيُوتًا فَسَلِّمُوا عَلَىٰ أَنفُسِكُمْ تَحِيَّةً مِّنْ عِندِ اللَّهِ مُبَارَكَةً طَيِّبَةً ۚ كَذَٰلِكَ يُبَيِّنُ اللَّهُ لَكُمُ الْآيَاتِ لَعَلَّكُمْ تَعْقِلُونَ ﴿٦١﴾ ع ٨/١٤

आंधळ्यावर, लंगड्यावर, आजाऱ्यावर, आणि स्वत: तुमच्यावर, याबाबत काहीच हरकत नाही की, तुम्ही आपल्या घरातून खाऊन घ्या, किंवा आपल्या वडिलांच्या घरातून, किंवा आपल्या आईच्या घरांतून, किंवा आपल्या भावांच्या घरांतून, किंवा आपल्या बहिणींच्या घरांतून, किंवा आपल्या काकांच्या घरांतून,[४] किंवा आपल्या आत्यांचे घरांतून, किंवा आपल्या मामांच्या घरांतून, किंवा आपल्या मावश्यांच्या घरांतून, किंवा त्या घरांतून, ज्यांच्या किल्ल्यांचे तुम्ही मालक आहांत, किंवा आपल्या मित्रांच्या[५] घरांतून. तुमच्यावर यांतही काही गुनाह नाही (की), तुम्ही सर्व बरोबर बसून जेवण करावे, किंवा वेगवेगळे.[६] मग जेव्हा तुम्ही घरी जाऊ लागाल, तर आपल्या घरवाल्यांना सलाम करून घेत चला.[७] (ही) भलाईची दुआ आहे जी शुभ आणि पवित्र आहे. अल्लाहतआलाकडून अवतरीत झालेली, अशाचप्रकारे अल्लाहतआला उघड उघड करून, आपले आदेश तुम्हास सांगत आहे, कारण की तुम्ही समजून घ्यावे. (६१) रु ८/१४

إِنَّمَا الْمُؤْمِنُونَ الَّذِينَ آمَنُوا بِاللَّهِ وَرَسُولِهِ وَإِذَا كَانُوا مَعَهُ عَلَىٰ أَمْرٍ جَامِعٍ لَّمْ يَذْهَبُوا حَتَّىٰ يَسْتَأْذِنُوهُ ۚ إِنَّ الَّذِينَ يَسْتَأْذِنُونَكَ أُولَٰئِكَ الَّذِينَ يُؤْمِنُونَ بِاللَّهِ وَرَسُولِهِ ۚ فَإِذَا اسْتَأْذَنُوكَ لِبَعْضِ شَأْنِهِمْ فَأْذَن لِّمَن شِئْتَ مِنْهُمْ وَاسْتَغْفِرْ لَهُمُ اللَّهَ ۚ إِنَّ اللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿٦٢﴾

ईमानवाले तर तेच लोक आहेत, जे अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर भरोसा ठेवतात. आणि अशा मामल्यांत ज्यांत लोकांना जमा होण्याची आवश्यकता असते, पैगंबराबरोबर असतात. तर जोपर्यंत आपल्याकडून परवानगी घेत नाही, कोठेही जात नाहीत. जे लोक, अशा प्रसंगी आपल्याकडून परवानगी घेऊन घेतात, वास्तवात हेच आहेत, जे अल्लाहतआलावर आणि त्याच्या पैगंबरावर, ईमान आणून चुकले आहेत.[८] तर जेव्हा असे लोक, आपल्या कोण्या कामाकरीतां, परवानगी मागतील, तर आपण यांच्यातून ज्यांना इच्छाल, परवानगी देऊन टाकीत चला. आणि त्यांच्याकरीता अल्लाहजवळ क्षमेची प्रार्थना करा. नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (६२)

१) या मुलांनी अभिप्रेत, स्वतंत्र मुले आहेत. भर वयाला पोहचल्यानंतर, यांचा हुकूम, सर्व साधारण पुरूषांसारखा आहे. यासाठी यांच्यासाठी आवश्यक आहे. जेव्हापण कोणाच्या घरी येतील, तर प्रथम त्यांनी परवानगी घ्यावी.

२) याच्याने अभिप्रेत, त्या म्हाताऱ्या आणि काम करण्यांस असमर्थ, स्त्रियांआहेत, ज्यांना मासिक पाळी येणे बंद झाले असेल. आणि प्रसुतीच्या योग्य राहिल्या नसतील. या वयांत सर्वसाधारण पणे, स्त्रींत, पुरूषांकरीता, नैसर्गिक रित्या जे लैगिंक आकर्षण असते, ते संपून जाते. न ती कोण्या पुरूषाबरोबर लग्नाची इच्छुक असते, न

पुरूषच त्यांच्यासाठी अशा भावना बाळगतात. अशा स्त्रीयांना, परद्यापासून सुट देण्यात आली आहे. ''कपडे उतारून द्यावेत'' ने ते कापडे अभिप्रेत आहे, जे शलवार कमीजच्या वरती, स्त्री, परद्यासाठी मोठी चादर, किंवा बुर्ख्याच्या स्वरूपांत घेत असते. या अटीवर की, उद्देश आपली शोभा साज शृंगाराचे प्रदर्शन नसावे. याचा अर्थ हा आहे की, कोणी स्त्री आपले लैगिंक आकर्षक संपून गेल्यावर सुद्धा, जर साज शृंगाराच्या मार्फत आपले स्त्रीत्व प्रदर्शित करण्याच्या रोगांत व्यस्त असेल, तर ती पर्दा न करण्याच्या हुकुमापासून वगळली जाईल. आणि तिला संपूर्ण पर्दा करणे आवश्यक राहील.

३) म्हणजे चर्चित म्हाताऱ्या स्त्रियांनी पण, परद्यांत कमी करू नये; किंबहुना नेहमीप्रमाणे मोठी चादर किंवा बुर्कापण उपयोगांत आणत रहावा; हे त्यांच्यासाठी उत्तम आहे.

४) याचा एक अर्थ तर हा सांगितला गेला आहे की, जिहादमध्ये जातांना सहाबा किराम, महावाक्यांत चर्चित, अपंगांना आपल्या घराच्या किल्ल्या देऊन जात; आणि त्यांना घरांतील वस्तुपण खाण्यापिण्याची परवानगी पण देऊन देत. परंतु हे अपंग सहाबा ﷺ असे असून सुद्धा, मालकांच्या अनुपस्थितीत, तेथे खाणे पिणे योग्य समजत नसत. अल्लाहने फर्माविले की, अशा माणसांसाठी आपल्या नातेवाईकांच्या घरांमधून, किंवा ज्या घरांच्या किल्ल्या त्यांच्याजवळ आहेत, त्यांच्यातून खाण्या पिण्यांत काही व्यत्यय (गुनाह) नाही. आणि काहींनी याचा हा अर्थ सांगितला आहे की, तंदुरूस्त सहाबा, अपंग सहाबाबरोबर बसून खाणे, यासाठी नापसंत करीत की, ते अंपगत्वामुळे, कमी खातील, आणि हे जास्त खाऊन जातील. अशा प्रकारे खाण्यांत कोठे त्यांच्यावर जुलूम न होऊन जावा. अशाच प्रकारे स्वत: अपंग सहाबा पण, दुसऱ्या लोकांबरोबर जेवणे, यासाठी पसंत करीत नसत, की, लोकांनी त्यांच्या बरोबर जेवण्यांत कमीपणा समजू नये. अल्लाहतआलाने दोघांकरीता खुलासा करून दिला की, याच्यांत काही गुन्ह्यांवाली गोष्ट नाही.

५) तथापि काही धर्मपंडितांनी खुलासा केला आहे की, याच्याने अभिप्रेत ते सर्व साधारण जेवण आहे, ज्याच्या खाल्ल्याने कोणाला कमीपणा वाटत नाही. तथापि, अशा चांगल्या वस्तूज्या मालकांनी विशेष म्हणून, वेगळ्या लपवून ठेवल्या असतील की, कोणाच्या नजरेस न पडाव्यात, अशाच प्रकारे सांठवून ठेवलेल्या वस्तू, त्यांचे खाणे, आणि त्यांना आपल्या उप्योगात आणणे योग्य नाही. (अयसरुत तफासीर) अशाच प्रकारे येथे मुलांच्या घरांचा उल्लेख केला नाही. याचे कारण हे आहे की, मुलांची घरे, ही माणसाची आपलीच घरे आहेत. ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे, ''तूआणि तुझी संपत्ती, तुझ्या बापाची आहेत.'' (इब्ने माजा क्र.२२९१ मुसनद अहमद १७९/२, २०४, २१४) दुसऱ्या हदीसमध्ये आहे, ''माणसाची संतती, त्याच्या कमाईतून आहे.'' (इब्ने माजा क्र.२१३७, अबुदाऊद क्र.३५२८)

६) याच्यांतून आणखी एका अडचणीचे निर्रसन करून दिले आहे. काही लोक एकटे खाणे पिणे पसंत करीत नसत. आणि कोणाला बरोबर घेऊन खाणे आवश्यक समजत असत. अल्लाहतआलाने फर्माविले, एकत्र जेवा, किंवा वेगवेगळे, दोन्ही प्रकारे योग्य आहे; गुनाह कोणांतच नाही. तथापि, एकत्र होऊन जेवणे, जास्त बरकतीला कारणीभूत आहे. जसे की काही हदीर्शीनी ठाऊक होते. (इब्ने कसीर)

७) यांत आपल्या घरांत प्रवेश करण्याचा शिष्टाचार, सांगण्यात आला आहे. आणि तो हा की, दाखल होते वेळी, घरवाल्यांना सलाम करा. माणसासाठी आपली पत्नी किंवा आपल्या मुलांनी सलाम करणे, सर्वसाधारणपणे कमीपणाचे वाटते. परंतु ईमानवाल्यांसाठी आवश्यक आहे की, त्यांनी अल्लाहच्या हुकूमाप्रमाणे असे करावे. सरशेवटी, आपल्या पत्नी आणि मुला बाळांना, सलामतीच्या दुआंपासून का वंचित ठेवले जावे ?

८) म्हणजे जुमुआ आणि ईदींच्या संमेलनात, किंवा अंतर्गत व बाह्य समस्यांवर, चर्चा करण्यासाठी बोलविण्यांत आलेल्या सभांमध्ये, ईमानवाले तर हजर असतात, अशाच प्रकारे जर ते भाग घेण्यास असमर्थ असतील, तर परवानगी घेतात. ज्याचा अर्थ दुसऱ्या शब्दांत, हा झाला की, दांभिक लोक, अशा संमेलनात भाग घेण्यापासून, आणि आपण (सल्ल.) कडून परवानगी घेण्यापासून टाळाटाळ करतात.

لَا تَجْعَلُوْا دُعَآءَ الرَّسُوْلِ بَیْنَكُمْ كَدُعَآءِ بَعْضِكُمْ بَعْضًا ؕ قَدْ یَعْلَمُ اللّٰهُ الَّذِیْنَ یَتَسَلَّلُوْنَ مِنْكُمْ لِوَاذًا ۚ فَلْیَحْذَرِ الَّذِیْنَ یُخَالِفُوْنَ عَنْ اَمْرِهٖۤ اَنْ تُصِیْبَهُمْ فِتْنَةٌ اَوْ یُصِیْبَهُمْ عَذَابٌ اَلِیْمٌ ﴿۶۳﴾

तुम्ही अल्लाहतआलाच्या पैगंबराला बोलविण्याला, असे मामुली बोलावणे समजू नका, जसे आपसांत एकमेकांना बोलावितात. [१] तुमच्यातून त्यांना अल्लाह खूप चांगल्याप्रकारे जाणतो, जे दृष्टी टाळून, हळूंच सरकून जातात. [२] ऐका! जे लोक पैगंबराच्या आदेशाच्या विरूद्ध करतात, त्यांना भीत रहावयांस पाहिजे की, कोठे त्यांच्यावर कोणी, भयंकर संकट न येऊन पडावे, [३] किंवा त्यांच्यावर कोणी दु:खदायक शिक्षा न येवो ६३

اَلَاۤ اِنَّ لِلّٰهِ مَا فِی السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ قَدْ یَعْلَمُ مَاۤ اَنْتُمْ عَلَیْهِ ؕ وَیَوْمَ یُرْجَعُوْنَ اِلَیْهِ فَیُنَبِّئُهُمْ بِمَا عَمِلُوْا ؕ وَاللّٰهُ بِكُلِّ شَیْءٍ عَلِیْمٌ ﴿۶۴﴾ ع ٩ ٣ ١٥

९ ३ १५ सावध होऊन जा की, आकाश आणि पृथ्वीत जे काही आहे, सर्व अल्लाहतआलाचेच [४] आहे. ज्या मार्गावर तुम्ही चालत आहांत, त्याला तो फार चांगल्या प्रकारे जाणतो; आणि ज्या दिवशी हे सर्व त्याच्याकडे परतून नेले जातील, त्या दिवशी, त्यांना, यांच्या कर्मांची जाणीव करून देईन. अल्लाहतआला सर्व काही जाणतो [५] ६४







تَبٰرَكَ الَّذِیْ نَزَّلَ الْفُرْقَانَ عَلٰی عَبْدِهٖ لِیَكُوْنَ لِلْعٰلَمِیْنَ نَذِیْرَا ﴿۱﴾

फारच धन्य आहे तो अल्लाहतआला, ज्याने आपल्या सेवकावर फुर्कान [६] अवतरित केले. की त्याने सकल जगाच्या लोकांसाठी, सावध करणारा [७] होऊन जावे. १

اِلَّذِیْ لَهٗ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَلَمْ یَتَّخِذْ وَلَدًا وَّلَمْ یَكُنْ لَّهٗ شَرِیْكٌ فِی الْمُلْكِ وَخَلَقَ كُلَّ شَیْءٍ فَقَدَّرَهٗ تَقْدِیْرًا ﴿۲﴾

आकाश आणि पृथ्वीत [८] याच अल्लाहचे राज्य आहे. आणि तो कोणी संतती बाळगत नाही. [९] तसेच त्याच्या राज्यांत, कोणी त्याचा भागीदार नाही. [१०] आणि प्रत्येक वस्तुला त्याने निर्माण करून, एक योग्य अंदाज ठरवून दिला आहे. [११] २

وَاتَّخَذُوْا مِنْ دُوْنِهٖۤ اٰلِهَةً لَّا یَخْلُقُوْنَ شَیْئًا وَّهُمْ یُخْلَقُوْنَ وَلَا یَمْلِكُوْنَ لِاَنْفُسِهِمْ ضَرًّا وَّلَا نَفْعًا وَّلَا یَمْلِكُوْنَ مَوْتًا وَّلَا حَیٰوةً وَّلَا نُشُوْرًا ﴿۳﴾

आणि त्या लोकांनी अल्लाहच्या शिवाय, ज्यांना आपले उपास्य बनवून ठेवले आहेत, ते कोण्या वस्तुला निर्माण करू शकत नाही, किंबहुना ते खुद्द (दुसऱ्याचे) निर्मित आहे. ते आपल्या जीवाच्या नफा नुकसानीचा पण अधिकार बाळगत नाहीत. आणि न जीवन मृत्यूचा, आणि (न) दुसऱ्यांदा जिवंत होऊन उठण्याचे ते मालक आहेत [१२] ३

وَقَالَ الَّذِیْنَ كَفَرُوْۤا اِنْ هٰذَاۤ اِلَّاۤ اِفْكُ ِۨافْتَرٰىهُ وَاَعَانَهٗ عَلَیْهِ قَوْمٌ اٰخَرُوْنَ ۚ فَقَدْ جَآءُوْ ظُلْمًا وَّزُوْرًا ﴿۴﴾

आणि काफिरांनी म्हटले, हे तर फक्त याने रचलेले खोटे आहे; ज्यावर आणखी लोकांनी सुद्धा त्याची, मदत केली आहे. [१३] खरे म्हणजे हे काफिर मोठा जुलूम, आणि मोठी लबाडी करणारे आहेत ४

१) याचा एक अर्थ तर हा आहे की, ज्याप्रमाणे तुम्ही एक दुसऱ्याला, नाव घेऊन बोलवितात, रसूलुल्लाह सल्लल्लाहु व अलैहि व सल्लमला, अशा प्रकारे बोलावू नका. उदाहरणार्थ या मुहम्मद! ﷺ ऐवजी या रसूलुल्लाह ! या नबी अल्लाह! वगैरे म्हणा. (हे आपल्या जीवनापर्यंत होते. जेव्हा सहाबाकरामला आवश्यकता भासत असे, की आपल्याशी बोलावे.) दुसरा अर्थ हा आहे की, पैगंबराच्या शापाला, दुसऱ्यांच्या शापांसारखे समजू नका. यासाठी की, आपली दुआ तर मान्य (च) होते. म्हणून पैगंबराची बद्दुआ (शाप) घेऊं नका. तुम्ही नष्ट होऊन जाल.

२) ही दांभिक लोकांची वागणूक असे. की, सल्लामसलतीच्या बैठकी, मधून, हळूंच खसकून जात.

३) या संकटाने अभिप्रेत, मनांची ती वक्रता आहे जी माणसाला ईमानापासून वंचित् करून देते. हा, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या आदेशांना न जुमानणे, आणि त्यांच्या विरोधांत जाण्याचा परिणाम आहे. आणि ईमानापासून

वंचित् रहाणे, आणि कुफ्रवर शेवट, नरकाग्नीच्या कायमच्या शिक्षेला कारणीभूत आहे. जसे की, महावाक्याच्या पुढच्या भागांत सांगितले. तर नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे मार्गदर्शन, पद्धती आणि सुन्नतीला, नेहमी समोर ठेवावयास पाहिजे. यासाठी की, ज्या कथनी आणि करणी, याच्याप्रमाणे असतील, तेच अल्लाहच्या दरबारी मान्य आणि दुसरे सर्व रद्द केले जातील. रसूलुल्लाह ﷺ चे फर्मान आहे, ''ज्याने असे काम केले, जे आमच्या पद्धतीवर नाही, ते रद्द आहे.'' (अल्बुखारी, व मुस्लिम)

४) निर्मितीच्या अनुषंगाने पण, मालकीच्या अनुषंगाने पण, आणि अधिनतेच्या अनुषंगाने पण. तो जसा इच्छील, तसा फेरबदल करील. आणि ज्या गोष्टीचा इच्छील, त्याचा हुकूम करीन. तर त्याच्या पैगंबराच्या बाबतीत, अल्लाहला भीत राहिले पाहिजे. ज्याचा तगादा आहे की, पैगंबराच्या कोण्या हुकूमाचा विरोध न केला जावा. आणि ज्यापासून त्याने मना केले आहे, ते केले जाऊ नये. यासाठी की पैगंबराच्या पाठविण्याचा उद्देश्य हा आहे की, त्याच्या हुकुमाने, पैगंबराचे आज्ञापालन केले जावे.

५) ही पैगंबराच्या विरोधकांना तंबी आहे की, जे काही प्रयत्न तुम्ही करीत आहांत, असे समजू नका की, ते अल्लाहपासून गुप्त राहू शकतात. त्याच्या ज्ञानांत सर्व काही आहे; आणि तो याच्याप्रमाणे कयामतच्या दिवशी, बक्षीस किंवा शिक्षा देईन.

६) फूर्कान चा अर्थ आहे, सत्य आणि असत्य, तौहिद आणि शिर्क, न्याय आणि अन्याय यांचे दर्म्यान फरक करणारा. या कुरआनाने अगदी स्पष्ट करून या आदेशांचा खुलासा करून दिला आहे; म्हणून याला 'फूर्कान' म्हणण्यात आले.

७) याने पण ठाऊक झाले की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची पैगंबरी सर्व विश्वासाठी आहे. आणि आपण ﷺ सकल मानव आणि जिन्नातांसाठी, हिदायत करणारे आणि मार्गदर्शक बनवून पाठविले गेले. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''अहो लोकांनो ! मी तुम्हांसर्वांकडे, त्या अल्लाहतआलाचा पाठविलेला आहे.'' (सू.अअ्राफ-१५८) आणि हदीसमध्ये सांगितले, ''मलालाल आणि काळ्या, सर्वांकडे पैगंबर बनवून पाठविण्यांत आले आहे.'' (स.मुस्लिम) ''पहले पैगंबर कोण्या एका समाजाकडे पाठविण्यांत येत असे आणि मी सकल लोकांकडे पैगंबर बनवून पाठविण्यात आलो आहे.'' (स.बुखारी, स.मुस्लिम) पैगंबरीनंतर एकेश्वरवादाचे (तौहिद) वर्णन केले जात आहे. येथे अल्लाहची चार विशेषणे सांगण्यात आली आहेत.

८) हे पहिले वैशिष्ट्य आहे; म्हणजे विश्वामध्ये, तोच निर्णय करणारा आहे, दुसरा कोणीही नाही.

९) यात, ख्रिस्ती, यहूदी आणि त्या अरब घराण्यांचे खंडन आहे, जे देवदुतांना अल्लाहच्या मुली ठरवत असत.

१०) याच्यांत मूर्तीपुजक मुशरिक लोक, आणि दोन देव मानणारे, (दोन देव, वाईट आणि चांगल्याचे, अंध:कार आणि प्रकाशाचे निर्माते) यांचे खंडन आहे.

११) प्रत्येक गोष्टीचा निर्माता फक्त तोच आहे. आणि आपल्या प्रयोजन आणि मर्जी प्रमाणे, त्याने आपल्या सृष्टीला प्रत्येक ती वस्तूपण मिळवून दिली आहे, जी तिच्यासाठी योग्य आहे. किंवा प्रत्येकाची रोजी आणि मृत्यु, त्याने पूर्वीपासूनच नक्की केलेली आहे.

१२) परंतु अन्यायी लोकांनी, अशा सर्व वैशिष्टयांच्या स्वामीला सोडून, अशा लोकांना (आपला) पालनकर्ता बनवून घेतला आहे, जे आपल्या स्वत:च्या बाबतीत सुद्धा कोण्या गोष्टीचा अधिकार बाळगत नाही. तसेच ते कोण्या दुसऱ्यासाठी काही करण्याची शक्तीपण बाळगत नाही. याच्यानंतर पैगंबरीला नाकारण्याच्या शंकेचे निर्सन करण्यांत येत आहे.

१३) मुशरिकीन म्हणत असत की, मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम ने हे पुस्तक रचण्यांत यहुद्यांच्या धर्मपंडीतांची (उदा.अबुफकीहा, यसार, आणि जबर वगैरेची) मदत घेतली आहे. जसे की सू.नहल आ.१०३ मध्ये, याचा आवश्यक तपशील येऊन चुकला आहे. येथे कुरआनाने या आरोपाला जुलूम आणि खोटे ठरविले आहे. बरे, एक निरक्षर मनुष्य, दुसऱ्यांच्या मदतीने, असे पुस्तक सादर करू शकतो, जे उत्कृष्ट वर्णन शैली आणि विद्वत्तापूर्ण, चमत्कृतीपूर्ण वाणीत अनुपम असावे. जे खऱ्या हकीकत आणि सत्त्य कथनांत पण मानवी क्षमतेच्या पलीकडे असावे. मानवी जीवनाकरता, आदेश आणि कायद्यांच्या तपशीलांत सुद्धा, 'लाजवाब' असावे. आणि भूतकाळांतील बातम्या आणि भविष्यांत घडून येणाऱ्या घटनांकडे अंगुलीनिर्देश, आणि स्पष्टीकरणामध्ये, याची सत्यता परीपूर्ण आहे.

وَ قَالُوْٓا اَسَاطِيْرُ الْاَوَّلِيْنَ اكْتَتَبَهَا فَهِيَ تُمْلٰى عَلَيْهِ بُكْرَةً وَّ اَصِيْلًا ﴿٥﴾

आणि हे पण म्हटले की, या तर पूर्वीच्या लोकांच्या कहाण्या आहेत, ज्या याने लिहून ठेवल्या आहेत; बस त्याच्यासमोर सकाळ सांज वाचल्या जातात.[१] (५)

قُلْ اَنْزَلَهُ الَّذِيْ يَعْلَمُ السِّرَّ فِي السَّمٰوٰتِ وَ الْاَرْضِ ۭ اِنَّهٗ كَانَ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿٦﴾

आपण सांगून टाका की, याला तर त्या अल्लाहने उतारले आहे, जो आकाश आणि पृथ्वीच्या सर्व गुप्त गोष्टींना जाणतो. नि:संशय तो फारच मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे.[२] (६)

وَ قَالُوْا مَالِ هٰذَا الرَّسُوْلِ يَاْكُلُ الطَّعَامَ وَ يَمْشِيْ فِي الْاَسْوَاقِ ۭ لَوْلَآ اُنْزِلَ اِلَيْهِ مَلَكٌ فَيَكُوْنَ مَعَهٗ نَذِيْرًا ﴿٧﴾

आणि त्यांनी म्हटले की, हा कसा पैगंबर आहे? जेवण करतो, आणि बाजारांत चालतो फिरतो;[३] याच्या बरोबर कोणी देवदूत का म्हणून पाठविला जात नाही ? की, तो त्याच्याबरोबर मिळून, भिवविणारा होऊन गेला असता.[४] (७)

اَوْ يُلْقٰٓى اِلَيْهِ كَنْزٌ اَوْ تَكُوْنُ لَهٗ جَنَّةٌ يَّاْكُلُ مِنْهَا ۭ وَ قَالَ الظّٰلِمُوْنَ اِنْ تَتَّبِعُوْنَ اِلَّا رَجُلًا مَّسْحُوْرًا ﴿٨﴾

किंवा त्याच्याजवळ कोणी खजीनाच टाकून दिला[५] गेला असता; किंवा त्याची कोणी बाग असती, जिच्यातून तो खाता;[६] आणि या जालिमांनी म्हटले की, तुम्ही तर अशा माणसाच्या मागे लागून गेला आहांत, ज्याच्यावर जादू करून देण्यात आला आहे[७] (८)

اُنْظُرْ كَيْفَ ضَرَبُوْا لَكَ الْاَمْثَالَ فَضَلُّوْا فَلَا يَسْتَطِيْعُوْنَ سَبِيْلًا ﴿٩﴾

विचार तर करा की, हे लोक तुमच्या बाबतीत कशा कशा गोष्टी बनवतात. बस ज्याने स्वत: हेच बहकून गेले आहेत; आणि कुठल्याही प्रकारे सरळ मार्गावर येऊ शकत नाही.[८] (९)

تَبٰرَكَ الَّذِيْٓ اِنْ شَاۗءَ جَعَلَ لَكَ خَيْرًا مِّنْ ذٰلِكَ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ ۙ وَ يَجْعَلْ لَّكَ قُصُوْرًا ﴿١٠﴾

अल्लाहतआला तर असा शुभकारी आहे की, जर इच्छील तर आपणास, पुष्कळशा अशा बागा देऊन टाकील, ज्या यांनी सांगितलेल्या बागांपेक्षा पुष्कळच उत्तम असतील, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात असतील, आणि आपणांस पुष्कळच पक्के महाल देऊन टाकीन[९] (१०)

१) हे यांच्या खोटे आणि आळ घेण्याचे उत्तरात म्हटले की, कुरआनाला तर पहा! त्यात काय आहे?काय याची एखादी चूक आणि घटनेच्या विरुद्ध आहे? खचितच् नाही. किंबहुना प्रत्येक गोष्टी बिलकुल बरोबर आणि सत्य आहे. यासाठी की, याला अवतरीत करणारे व्यक्तीत्व ते आहे, जे आकाश आणि पृथ्वीच्या प्रत्येक गुप्त गोष्टीला जाणते.

२) यासाठी तो क्षमा आणि दुर्लक्ष करण्याने काम घेतो. नाहीतर यांचा कुरआन रचण्याचा आरोप, फार तीव्र आहे; ज्यावर ते लगेचच अल्लाहच्या शिक्षेच्या पकडींत येऊ शकतात.

३) कुरआनावर टिका केल्यानंतर, पैगंबरांवर टिका केली जात आहे. आणि ही टिका पैगंबराच्या मानव होण्यावर आहे. कारण की, यांच्या विचारात मनुष्यत्व पैगंबरांची महत्ताच्या लाईकी ची नाही. म्हणून त्यांनी म्हटले की, हा तर खातो पितो आणि बाजारांत ये जा करतो. आणि आमच्याच सारखा एक मनुष्य आहे. वास्तविक पैगंबराला तर मनुष्य व्हावयास नको.

४) चर्चित आक्षेपांहून खाली उतरून, सांगण्यात येत आहे की, चला! आणखी काही नाही तर, एक देवदूतच त्याच्या बरोबर असावा जो याचा मदतगार आणि त्याला खरे ठरविणारा असावा.

५) कारण की, रोजी कमविण्यापासून तो निरपेक्ष राहता.

६) कारण की, त्याची स्थिती आमच्यापेक्षा काही वेगळी होऊन गेली असती.

७) म्हणजे ज्याची बुद्धी आणि समज, जादूने भारित आणि सैरभैर आहे.

८) म्हणजे हे पैगंबरा ! आपल्या संबंधात, या प्रकारच्या गोष्टी आणि आळवट घेतात; कधी जादूगिर म्हणतात; कधी जादू केलेला आणि वेडा, आणि कधी खोटारडा आणि कवी. वास्तविक या सर्व गोष्टी असत्य आहेत. आणि ज्यांच्याजवळ कणभर देखील बुद्धी आणि समज आहे, ते यांचे खोटे होणे, समजतात. बस! तर ते अशा गोष्टी करून, स्वत:च हिदायतच्या मार्गापासून दूर जातात. त्यांना योग्य मार्ग कसा काय नशीबी येऊ शकतो?

९) म्हणजे हे आपल्याकडे ज्या मागण्या करीत आहेत, अल्लाहजवळ या पूर्ण करून देणे, काही कठीण नाही. तो इच्छील तर यांच्यापेक्षा उत्तम बागा आणि महल जगांत, आपणांस प्रदान करूशकतो. जे यांच्या डोक्यांत आहे. परंतु यांच्या मागण्या नाकारण्यासाठी आणि अहंकाराने आहेत. न की, हिदायत मिळण्यासाठी, तसेच न की मुक्तीच्या शोधात.

بَلْ كَذَّبُوْا بِالسَّاعَةِ ۗ وَاَعْتَدْنَا لِمَنْ كَذَّبَ بِالسَّاعَةِ سَعِيْرًا ۚ ﴿١١﴾

(गोष्ट अशी आहे की) हे लोक कयामतला खोटी समजतात. आणि कयामतला नाकारणाऱ्यांसाठी आम्ही, धगधगीत अग्नी तयार करून ठेवला आहे.[१] ११

اِذَا رَاَتْهُمْ مِّنْ مَّكَانٍۢ بَعِيْدٍ سَمِعُوْا لَهَا تَغَيُّظًا وَّ زَفِيْرًا ﴿١٢﴾

जेव्हा ती त्यांना लांबून पाहील, तेव्हा हे तिचे रागाने, आवेग आणि ओरडणे ऐकतील[२] १२

وَاِذَآ اُلْقُوْا مِنْهَا مَكَانًا ضَيِّقًا مُّقَرَّنِيْنَ دَعَوْا هُنَالِكَ ثُبُوْرًا ۗ ﴿١٣﴾

आणि जेव्हा हे, नरकाग्नीच्या कोण्या तंग जागेत, मुसक्या बांधून फेकून दिले जातील, तेव्हा तेथे आपल्यासाठी मृत्युच मृत्यूला बोलावतील १३

لَا تَدْعُوا الْيَوْمَ ثُبُوْرًا وَّاحِدًا وَّادْعُوْا ثُبُوْرًا كَثِيْرًا ﴿١٤﴾

(त्यांना सांगण्यात येईल) आज एकाच मृत्यूला बोलावू नका, किंबहुना अनेक मृत्यूंना बोलवा[३] १४

قُلْ اَذٰلِكَ خَيْرٌ اَمْ جَنَّةُ الْخُلْدِ الَّتِيْ وُعِدَ الْمُتَّقُوْنَ ۭ كَانَتْ لَهُمْ جَزَاۗءً وَّ مَصِيْرًا ﴿١٥﴾

आपण सांगून द्या की काय हे उत्तम आहे,[४] किंवा तो नेहमीचा स्वर्ग, ज्यांचा वायदा भिऊन वागणाऱ्यांशी केला गेला आहे. जो यांचा बदला आहे, आणि त्यांच्या परतण्याचे खरे ठिकाण आहे. १५

لَهُمْ فِيْهَا مَا يَشَاۗءُوْنَ خٰلِدِيْنَ ۭ كَانَ عَلٰي رَبِّكَ وَعْدًا مَّسْـُٔوْلًا ﴿١٦﴾

ते जे इच्छतील, त्यांच्यासाठी तेथे ते आढळून येईल, कायम रहाणारे. हा तर तुमच्या पालनकर्त्याच्या ठायी (एक) वायदा आहे; ज्याची मागणी केली जाऊ शकते.[५] १६

وَيَوْمَ يَحْشُرُهُمْ وَمَا يَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ فَيَقُوْلُ ءَاَنْتُمْ اَضْلَلْتُمْ عِبَادِيْ هٰٓؤُلَاۗءِ اَمْ هُمْ ضَلُّوا السَّبِيْلَ ﴿١٧﴾

आणि ज्या दिवशी अल्लाह त्यांना, आणि अल्लाहच्याशिवाय ज्यांना ते पुजत राहिले, त्यांना जमा करून, विचारील की, काय माझ्या या सेवकांना तुम्ही बहकविले, किंवा हे स्वत:च बहकले?[६] १७

قَالُوْا سُبْحٰنَكَ مَا كَانَ يَنْۢبَغِيْ لَنَآ اَنْ نَّتَّخِذَ مِنْ دُوْنِكَ مِنْ اَوْلِيَاۗءَ وَلٰكِنْ مَّتَّعْتَهُمْ وَاٰبَاۗءَهُمْ حَتّٰى نَسُوا الذِّكْرَ ۚ وَكَانُوْا قَوْمًۢا بُوْرًا ﴿١٨﴾

ते उत्तर देतील की, तू परम पवित्र आहेस; स्वत: आम्हासच हे शोभत नव्हते की, तुझ्या शिवाय इतरांना (आम्ही) आपला कार्यसाधक बनविते.[७] गोष्ट ही आहे की, तू त्यांना आणि त्यांच्या वाडवडिलांना सुखोपभोग प्रदान केला, येथपावेतो की, ते उपदेशाला विसरून गेले. हे लोक होतेच[८] नाश पावणारे १८

فَقَدْ كَذَّبُوْكُمْ بِمَا تَقُوْلُوْنَ ۙ فَمَا تَسْتَطِيْعُوْنَ صَرْفًا وَّلَا نَصْرًا ۚ وَمَنْ يَّظْلِمْ مِّنْكُمْ نُذِقْهُ عَذَابًا كَبِيْرًا ﴿١٩﴾

त्यांनी तर तुम्हास तुमच्या सर्व गोष्टीत खोटे पाडीले. आता न तर तुमच्यांत शिक्षा टाळण्याची ताकद आहे, आणि न मदत करण्याची;[९] तुमच्यांतून ज्यांनी ज्यांनी जुलूम केला आहे,[१०] आम्ही त्याला मोठ्या शिक्षेची गोडी चाखवू १९

وَمَآ اَرْسَلْنَا قَبْلَكَ مِنَ الْمُرْسَلِيْنَ اِلَّآ اِنَّهُمْ لَيَاْكُلُوْنَ الطَّعَامَ وَيَمْشُوْنَ فِي الْاَسْوَاقِ ۭ وَجَعَلْنَا بَعْضَكُمْ لِبَعْضٍ فِتْنَةً ۭ اَتَصْبِرُوْنَ ۚ وَكَانَ رَبُّكَ بَصِيْرًا ﴿٢٠﴾ ع ٢ / ١١ / ١٧

आणि आम्ही आपणापूर्वी जेवढे पैगंबर पाठविले, सर्वच्या सर्व, जेवण पण करीत असत;[११] आणि बाजारांत पण चालत फिरत होते.[१२] आणि आम्ही, तुमच्या प्रत्येकाला, एक दुसऱ्याच्या परीक्षेचे साधन बनविले आहे.[१३] तर काय तुम्ही सहन कराल? आणि तुझा पालनकर्ता, सर्व काही पाहणारा आहे.[१४] २० (रुकूअ २ / ११ / १७)

१) कयामतला खोटे म्हणणे, पैगंबरीला पण नाकारण्याला कारणीभूत आहे.

२) म्हणजे नरकाग्नी, या काफिरांना दुरून हशरच्या मैदानांत पाहूनच रागाने खवळून उठेल; आणि यांना आपल्या प्रकोपात घेण्यासाठी ओरडेल, तळमळेल. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जेव्हा नर्कांत जाणारे, नरकाग्नीत टाकले जातील, तर तिच्या डरकाळ्या ऐकतील; आणि ती (प्रकोपाच्या आवेगाने) उसळत असेल. असे वाटेल की, रागाने फुटून पडेल'' (सू.मुल्क ७/८) नरकाग्नीचे पहाणे आणि ओरडणे, एक वास्तविक आहे. काल्पनिक नाही. अल्लाहकरीता तिच्यांत जाणीव आणि व्यक्त करण्याचे सामर्थ्य निर्माण करून देणे, काही कठीण नाही. तो जे इच्छील,ते करू शकतो. शेवटी बोलण्याची शक्तीपण, अल्लाहतआला तिला प्रदान करेल. आणि ती 'हल्‌मिम् मजीद' चा आवाज उंच खांत करीन (सू.काफ-३०)

३) म्हणजे नर्कवासी जेव्हा नरकाग्नी, च्या शिक्षेपासून अत्यंत त्रासून आकांक्षा करतील की त्यांना मृत्यू येऊन जावे की त्यांनी संपूर्ण नष्ट होऊन जावे. तेव्हा त्यांना सांगण्यात येईल की, आता एका मृत्यूला नाही, कित्येक मृत्यूंना बोलवा. अर्थ हा आहे की, तुमच्या दैवांत नेहमीसाठी, तऱ्हे तऱ्हेच्या शिक्षा आहेत. तुम्ही कोठपर्यंत मृत्युची मागणी कराल!

४) हा इशारा आहे, नरकाग्नीच्या चर्चित शिक्षांकडे; ज्यांत नर्कवासी, मुसक्या बांधलेल्या स्थितीत, व्यस्त होतील. की, हे उत्तम आहे, जो कुफ्र आणि शिर्कचा बदला आहे; किंवा तो स्वर्ग, ज्याचा वायदा भिऊन वागणाऱ्यांकरीता, त्यांचे ईशभय, आणि अल्लाहचे आज्ञापालन, यावर केला गेला आहे. हा प्रश्न नरकाग्नीत केला जाईल. परंतु त्याला या ठिकाणी याकरीता सांगण्यात आले आहे की, कदाचित् नर्कवासियांच्या या परिणामापासून, लोकांनी धडा घेऊन, ईशभय आणि आज्ञापालनाचा मार्ग अनुसरावा. आणि या वाईट परिणामापासून वाचून जावे, ज्याचे चित्रण येथे केले गेले आहे.

५) म्हणजे असा वायदा जो खचित्च पूर्ण होऊन राहील, जशी कर्जाची मागणी केली जाते; अशाच प्रकारे अल्लाहने, आपल्यावर वायदा आवश्यक करून घेतला आहे. ज्यांची ईमानवाले त्याच्याजवळ, मागणी करू शकतात. ही निव्वळ त्याची दया आणि कृपा आहे की, त्याने ईमानवाल्यांसाठी, या चांगल्या मोबदल्याला आपल्यासाठी आवश्यक ठरवून घेतले आहे.

६) या जगांत, अल्लाहच्या शिवाय ज्यांची उपासना केली जात राहिली आहे, आणि केली जात राहील, यांच्यात दगड, लाकूड आणि दुसऱ्या धातुपासून बनविलेल्या मूर्त्या पण आहेत; ज्या बुद्धीहीन आहेत. आणि अल्लाहचे पुण्यवान सेवकपण आहेत, जे बुद्धी बाळगणारे आहेत. उदाहरणार्थ ह.उजैर عليه السلام ह.ईसा عليه السلام आणि दुसरे कित्येक पुण्यवान सेवक. अशाच प्रकारे देवदूत आणि जिन्नातांचे पुजारीपण असतील. अल्लाहतआला बुद्धीहीन, निर्जीव वस्तूंना पण, समज आणि अक्कल आणि बोलण्याची क्षमता प्रदान करेल. आणि या सर्व उपास्यांना विचारील, की सांगा ! तुम्ही माझ्या सेवकांना, आपली उपासना करण्याचा हुकूम दिला होता; किंवा ते आपल्या मर्जीने, तुमची उपासना करून मार्गभ्रष्ट झाले होते?

७) म्हणजे जेव्हाआम्ही स्वत: तुझ्याशिवाय कोणाला कार्यसाधक समजत नव्हतो, तर मग, आम्ही आपल्या बाबतीत लोकांना, कशा प्रकारे म्हणू शकत होतो की, तुम्ही अल्लाहच्या ऐवजी, आम्हांस आपला मित्र आणि कार्यसाधक समजा.

८) हा शिर्क चा रोग आहे की, ऐहिक संपत्ती आणि साज सामानांच्या विपुलतेने, त्यांना तुझ्या स्मरणाकडून गाफील करून टाकले; आणि नाश पावणे आणि बर्बादी, त्यांच्या नशीबी आली.

९) हे अल्लाहतआलाचे म्हणणे आहे, जे मुशरिक लोकांना संबोधित करून, अल्लाहतआला म्हणेन की, तुम्ही ज्यांना आपला उपास्य समजत होते, त्यांनी तर तुम्हाला, तुमच्या गोष्टीत खोटे ठरवून टाकले आहे. आणि तुम्ही पाहून घेतले आहे की, त्यांनी तुमच्यापासून मुक्त होण्याची घोषणा करून टाकली आहे. जणू, तुम्ही ज्यांना आपला मदतगार समजत होते, ते मददगार सिद्द झाले नाहीत. आता काय तुमच्यात ही शक्ती आहे की, तुम्ही माझ्या शिक्षेला, आपल्यावरून टाळू शकाल, आणि आपली मदत करू शकाल?

१०) जुलुमाने अभिप्रेत तेच शिर्क आहे, जसे की, संदर्भाने पण स्पष्ट आहे. आणि कुरआनामध्ये दुसऱ्या ठिकाणी, शिर्कला मोठा जुलूम म्हणण्यात आले आहे, ''इन्नश्शिर्क लजुलमून अजीम' (सू.लुकमान-१३)

११) म्हणजे ते मनुष्यच होते आणि त्यांनाही अन्नाची आवश्यकता होती.

१२) म्हणजे हलाल रोजी मिळविण्यासाठी, कारागिरी आणि व्यापारपण करीत होते. अर्थ, यापासून हा आहे की, या गोष्टी पैगंबरी पदाच्या विरूद्ध नाही, ज्याप्रमाणे काही लोक समजतात.

१३) म्हणजे आम्ही त्या पैगंबराची, आणि त्यांच्या मार्फत त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांची पण परीक्षा घेतली; कारण की खरे खोटे वेगळे ओळखले जावे. ज्यांनी परीक्षेत, सहनशिलता पत्करली, ते यशस्वी आणि दुसरे अयशस्वी राहिलेत. म्हणूनच पुढे सांगितले, ''काय तुम्ही सहनशिलता पत्कराल ?''

१४) म्हणजे तो जाणतो की, वह्य आणि पैगंबरीला कोण पात्र आहे आणि कोण नाही? ''या गोष्टीला अल्लाहतआलाच चांगल्या प्रकारे जाणतो की, त्याने आपली पैगंबरी कोठे ठेवावी? (सू.अल् अनआम-१४४) हदीसमध्ये सुद्धा येते, रसूलुल्लाहु सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, की, अल्लाहने मला अधिकार दिला की बादशाह पैगंबर बनू का सेवक पैगंबर बनू? मी सेवक पैगंबर बनणे पसंत केले. (इब्ने कसीर)

وَقَالَ الَّذِينَ لَا يَرْجُونَ لِقَآءَنَا لَوْلَآ أُنْزِلَ عَلَيْنَا الْمَلٰٓئِكَةُ أَوْ نَرٰى رَبَّنَا ۗ لَقَدِ اسْتَكْبَرُوْا فِيْٓ أَنْفُسِهِمْ وَعَتَوْ عُتُوًّا كَبِيْرًا ﴿٢١﴾

**आणि ज्यांना आमच्या भेटीची आशा नाही, त्यांनी म्हटले की, आमच्यावर देवदूत का नाही उतारले जात? (१) किंवा आम्ही आमच्या डोळ्यांनी आपल्या पालनकर्त्याला पाहून घेतले असते? (२) या लोकांनी आपल्या स्वत:लाच फार मोठे समजून ठेवले आहे. आणि फारच शिरजोरी करून घेतली आहे. (३) (२१)**

يَوْمَ يَرَوْنَ الْمَلٰٓئِكَةَ لَا بُشْرٰى يَوْمَئِذٍ لِّلْمُجْرِمِيْنَ وَيَقُوْلُوْنَ حِجْرًا مَّحْجُوْرًا ﴿٢٢﴾

**ज्या दिवशी हे देवदूतांना पाहून घेतील, त्या दिवशी या गुन्हेगारांना काही आनंद होणार नाही; (४) आणि (देवदूत) म्हणतील की हे आमच्या पासून वंचितच वंचित ठेवले गेले! (५) (२२)**

وَقَدِمْنَآ إِلٰى مَا عَمِلُوْا مِنْ عَمَلٍ فَجَعَلْنٰهُ هَبَآءً مَّنْثُوْرًا ﴿٢٣﴾

**आणि त्यांनी जी जी कर्मे केली होती, आम्ही त्यांच्याकडे वळून, त्यांना विसकटलेल्या कणांसारखे करून टाकले (६) (२३)**

أَصْحٰبُ الْجَنَّةِ يَوْمَئِذٍ خَيْرٌ مُّسْتَقَرًّا وَّأَحْسَنُ مَقِيْلًا ﴿٢٤﴾

**तथापि त्या दिवशी स्वर्गवाशांचे ठिकाण उत्तम असेल, आणि शय्यागृह पण उत्कृष्ट असेल (७) (२४)**

وَيَوْمَ تَشَقَّقُ السَّمَآءُ بِالْغَمَامِ وَنُزِّلَ الْمَلٰٓئِكَةُ تَنْزِيْلًا ﴿٢٥﴾

**आणि ज्या दिवशी आकाश ढगावरून फाटून जाईल, (८) आणि देवदूत एकामागे एक उतरतील (२५)**

اَلْمُلْكُ يَوْمَئِذٍ الْحَقُّ لِلرَّحْمٰنِ ۗ وَكَانَ يَوْمًا عَلَى الْكٰفِرِيْنَ عَسِيْرًا ﴿٢٦﴾

**त्या दिवशी खरे राज्य फक्त परम दयाळू (अल्लाहचे) च असेल; आणि हा दिवस काफिरांवर फारच सख्त असेन (२६)**

وَيَوْمَ يَعَضُّ الظَّالِمُ عَلٰى يَدَيْهِ يَقُوْلُ يٰلَيْتَنِي اتَّخَذْتُ مَعَ الرَّسُوْلِ سَبِيْلًا ﴿٢٧﴾

**आणि त्या दिवशी, आज्ञाभंजक मनुष्य, आपल्या हातांना चाऊन चाऊन म्हणेन, की हाय! अरेरे!! मी पैगंबराचा मार्ग अनुसरला असता (२७)**

يٰوَيْلَتٰى لَيْتَنِيْ لَمْ أَتَّخِذْ فُلَانًا خَلِيْلًا ﴿٢٨﴾

**खेद आहे की, मी अमक्याला मित्र बनवले नसते (९) (२८)**

لَقَدْ أَضَلَّنِيْ عَنِ الذِّكْرِ بَعْدَ إِذْ جَآءَنِيْ ۗ وَكَانَ الشَّيْطٰنُ لِلْإِنْسَانِ خَذُوْلًا ﴿٢٩﴾

**त्याने तर मला याच्यानंतर बहकविले, की बोध माझ्यापर्यंत येऊन पोहचला होता; आणि शैतान तर माणसाला (वेळेवर) दगा देणारा आहे. (२९)**

وَقَالَ الرَّسُوْلُ يٰرَبِّ إِنَّ قَوْمِي اتَّخَذُوْا هٰذَا الْقُرْاٰنَ مَهْجُوْرًا ﴿٣٠﴾

**आणि पैगंबर म्हणेन की, हे माझ्या पालनकर्त्या! नि:संशय माझ्या लोकांनी, या कुरआनाला सोडून ठेवले होते (१०) (३०)**

१) म्हणजे कोण्या माणसाला पैगंबर बनवून पाठविण्याऐवजी, कोण्या देवदुताला पैगंबर बनवून पाठविले गेले असते; किंवा; हा अर्थ आहे की, पैगंबराबरोबर देवदूतपण अवतरीत झाले असते, ज्यांना आम्ही आपल्या डोळ्यांनी पाहिले असते. आणि ते या मानवी पैगंबराला मान्यता देते.

२) म्हणजे अल्लाहने येऊन, आम्हाला सांगितले असते की, मुहम्मद ﷺ माझा पैगंबर आहे; आणि त्याच्यावर ईमान आणणे तुमच्याकरीतांआवश्यक आहे.

३) याच अहंकार आणि शिरजोरीचा परिणाम आहे की, ते अशा प्रकारच्या मागण्या करीत आहेत; ज्या अल्लाहच्या मन्शेच्या विरूद्ध आहे. अल्लाहतआला तर, अदृष्टावर ईमानाच्या मार्फत, माणसांची परीक्षा घेतो. जर तो देवदुतांना त्यांच्या डोळ्यासमोर अवतरीत करून देईन, किंवा स्वत: तो जमिनीवर अवतरीत होईल, तर मग याच्यानंतर, त्यांच्या परीक्षा घेण्याचा पक्षच संपून जाईल. या करीतांअल्लाहतआला असे काम कसे करूंशकतो, जे त्याच्या निर्मितीच्या प्रयोजन आणि सृष्टी निर्माण करण्याच्या मर्जीच्या विरूद्ध असेल ?

४) या दिवसाने अभिप्रेत, मृत्युचा दिवस आहे. म्हणजे हे काफिर देवदुतांना पाहण्याची आकांक्षा तर करत आहेत, परंतु मृत्युच्या वेळी, जेव्हा देवदुतांना पाहतील, तर त्यांच्यासाठी काही खुषी आणि आनंद असणार नाही. यासाठी की, देवदूत त्यांना या वेळी, नरकाग्नीच्या शिक्षेची धमकी देत असतात; आणि म्हणतात की, हे घाणेरड्या आत्म्या ! घाणेरडया शरीरातून निघ; ज्यामुळे आत्मा धांवपळ करतो. ज्यावर देवदूत त्यांना मारहाण करतात; जसे की, सू.अन्फाल-५० आणि सू.अन्आम-९३, मध्ये आहे. याच्या विरूद्ध ईमानवाल्यांची स्थिती, प्राण जाण्याची वेळी, अशी असते की, देवदूत

त्याला, स्वर्ग आणि त्याच्या देणग्यांची, मनाला आनंद देणारी खुषखबर ऐकविता. जसे की, सू.हा-मीम-सजदा ३०-३२ मध्ये आहे. आणि हदीसमध्ये पण येते की, ''देवदूत ईमानवाल्यांच्या आत्म्याला म्हणतात की, हे पवित्र आत्म्या! जो पवित्र शरीरांत होता, निघ! आणि अशा जागी चल, जेथे अल्लाहच्या देणग्या आहेत. आणि तो पालनकर्ता आहे, जो तुझ्यावर प्रसन्न आहे.'' (तपशीला करीता पहा, मसनद अहमद ३६४-३६५/२, इब्ने माजा), काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत कयामतचा दिवस आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात की, दोन्हीही म्हणणे, बरोबर आहेत. यासाठी की, दोन्ही दिवस असे आहेत की, देवदूत, ईमानवाले आणि काफिर, दोघांसमोर जाहीर होतात. ईमानवाल्यांना रहमत आणि अल्लाहच्या प्रसन्नतेची खुषखबर, आणि काफिरांना बर्बाद होण्याची आणि घाट्याची बातमी देतात.

५) 'हिज्र' चा मूळ अर्थ आहे मना करणे, थांबवून देणे. ज्याप्रमाणे काझी कोणाला त्याच्या मूर्खपणामुळे किंवा अल्पवयाने, आपल्या संपत्तीत फेरबदल करण्यापासून मना करून टाकेन, तर म्हणतात काझीने अमक्याला फेरबदल करण्यापासून रोकून दिले आहे. याच संदर्भात खाना-ए-काबाच्या त्या भागाला (हतीमला) हिज्र म्हणण्यांत येते.

ज्याला मक्केच्या कुरैशी लोकांनी, खाना-ए-काबा मध्ये शामिल केले नव्हते. म्हणून तवाफ करणाऱ्यांसाठी, त्याच्या आंतून तवाफ करणे मना आहे. तवाफ करतांना त्याच्या बाहेरील भागाकडून जावयास पाहिजे, त्याला भिंतीने वेगळे करून दिले आहे. आणि बुद्धीला पण 'हिज्र' म्हटले जाते. यासाठी की, बुद्धी सुद्धा माणसांना अशा कामांपासून थांबविते, जे माणसासाठी योग्य नाही. अर्थ हा आहे की, देवदूत काफिरांना म्हणतात की, तुम्ही त्या गोष्टीपासून वंचित् आहांत, ज्यांची खुषखबर भिऊन वागणाऱ्यांना दिली जाते. म्हणजे हा 'हरामन् मुहर्रमन् अलैकुम' चा अर्थ आहे. आज जन्नतुल फिरदौस आणि त्याच्या देणग्या, तुमच्यावर हराम आहेत. त्याला पात्र फक्त ईमानवाले आणि ईशभय बाळगणारे असतील.

६) 'हबाअ' त्या सुक्ष्म कणांना म्हणतात, जे कोण्या छिद्रांतून, घरांत प्रवेश करणाऱ्या सूर्याच्या किरणांत जाणवतात; परंतु जर कोणी त्यांना हातांत पकडू इच्छील, तर हे शक्य नाही. काफिरांची कर्मे पण कयामतच्या दिवशी, कणांसारखे काहीच किंमत नसलेले होतील. कारण की ते ईमान आणि इखलासपासून रिक्त असतील. आणि धर्मशास्त्राप्रमाणे सुद्धां, रिक्त. जेव्हा की, अल्लाहजवळ मान्य होण्याला ही दोन्ही असण्याची अट आहे. ईमान आणि इखलास पण, इस्लामी धर्मशास्त्राप्रमाणे सुद्धां. याठिकाणी काफिरांच्या कर्मांना, ज्यांची काही किंमत नाही अशा कणांसारखे, म्हटले गेले आहे. अशाच प्रकारे दुसऱ्या ठिकाणी पण, कोठे राखेने, कोठे मृगजळाने, कोठे स्वच्छ चिकण्या दगडाने, तुलना करण्यांत आली आहे. या सर्व उपमा पहिले येऊन चुकल्या आहेत. कृपया पहावे सू.अल्बकर:२६४, सू.इब्राहीम-१८, आणि सू.नूर-२९.

७) काहींनी यापासून हा आधार पण घेतला आहे की, ईमानवाल्यांसाठी कयामतचा हा महाभयंकर दिवस इतका लहान, आणि त्यांचा हिशेब इतका सोपा असेल, की वामकुक्षीच्या (दुपारच्या जेवणानंतर थोडा वेळ आराम करणे) वेळेपर्यंत हे त्यापासून मोकळे होऊन जातील; आणि स्वर्गामध्ये हे आपल्या कुटुंबियांशी आणि मोठ्या डोळ्यांच्या अप्सरांबरोबर दुपारची विश्रांती घेत असतील. ज्याप्रमाणे हदीशींमध्ये आहे की, ईमानवाल्यांसाठी हा दिवस इतका सोपा असेल की, जगांत एक फर्ज नमाज पढून घेतली असती. (मुसनद अहमद ७५/४)

८) याचा अर्थ हा आहे की, आकाश फाटून जाईल. आणि ढग सावली देतील. अल्लाहतआला देवदुतांसह हशरच्या मैदानांत, जेथे सर्व सृष्टी जमा होईल, हिशेब घेण्यासाठी विराजमान होईल; जसे सू.बकर: आ.२१० मध्ये स्पष्ट आहे.

९) याच्याने ठाऊक झाले की, अल्लाहच्या आज्ञाभंजकांशी मैत्री आणि उठबस ठेवावयास नको. यासाठी की चांगल्याशी सोबत केल्याने मनुष्य चांगला आणि वाईटांशी सोबत केल्याने, मनुष्य वाईट बनतो. बहुतेक लोकांच्या बहकण्याचे कारण, चुकीच्या मित्रांची निवड, आणि वाईटांशी सोबत अंगीकारणे, हेच आहे. याचसाठी हदीसमध्ये पण, चांगल्या लोकांशी सोबतीची ताकीद, आणि वाईटांच्या सोबतीपासून वांचणे, एका उत्कृष्ट उपमेने, स्पष्ट केले गेले आहे. (कृपया पहावे स.मुस्लिम)

१०) 'मुशरिकीन लोक कुरआन ऐकविले जात असतांना फार गोंधळ करीत की, कुरआन ऐकता येऊ शकू नये. हे हिजरान आहे म्हणजे कुरआनापासून थांबवून देणे. आहे; यावर ईमान न आणणे, आणि यावर अंमलबजावणी न करणे, त्यावर चिंतन, मनन न करणे, आणि त्यांच्या हुकुमांवर, अंमलबजावणी, व कार्यरत होण्यापासून वांचणे पण, अशाचप्रकारे याला सोडून, कोण्या दुसऱ्या पुस्तकाला प्राधान्य देणे, हे हिजरान आहे. म्हणजे कुरआनाला सोडून देणे आणि त्याला तर्क करणे आहे. ज्याच्या विरूद्ध कयामतच्या दिवशी, अल्लाहचे पैगंबर अल्लाहच्या दरबारांत फिर्याद दाखल करतील.

وَكَذٰلِكَ جَعَلْنَا لِكُلِّ نَبِيٍّ عَدُوًّا مِّنَ الْمُجْرِمِيْنَ ۭ
وَكَفٰى بِرَبِّكَ هَادِيًا وَّنَصِيْرًا ﴿٣١﴾

आणि अशाच प्रकारे आम्ही प्रत्येक पैगंबराचे शत्रु काही गुन्हेगारांना करून दिले आहे. [१] आणि तुझा पालनकर्ताच हिदायत देणारा आणि मदत करणारा पुरेसा आहे [२] ३१

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَوْلَا نُزِّلَ عَلَيْهِ الْقُرْاٰنُ جُمْلَةً
وَّاحِدَةً ۚ كَذٰلِكَ ۚ لِنُثَبِّتَ بِهٖ فُؤَادَكَ وَرَتَّلْنٰهُ
تَرْتِيْلًا ﴿٣٢﴾

आणि नास्तिकांनी म्हटले की, याच्यावर कुरआन सर्वच्या सर्व एकाच वेळी, का उतारण्यात आले नाही [३] ? अशाचप्रकारे आम्ही (थोडे थोडे करून) उतारले, कारण की याच्याने, आम्ही आपले मन मजबूत करून द्यावे, आम्ही याला थांबून थांबूनच, वाचून ऐकविले आहे. [४] ३२

وَلَا يَاْتُوْنَكَ بِمَثَلٍ اِلَّا جِئْنٰكَ بِالْحَقِّ وَاَحْسَنَ
تَفْسِيْرًا ﴿٣٣﴾

आपल्या जवळ जे काही उदाहरण आणतील, आम्ही याचे खरे उत्तर, आणि स्पष्ट विवेचन, आपणांस दाखवून देऊ [५] ३३

اَلَّذِيْنَ يُحْشَرُوْنَ عَلٰي وُجُوْهِهِمْ اِلٰى جَهَنَّمَ ۙ اُولٰۗىِٕكَ
شَرٌّ مَّكَانًا وَّاَضَلُّ سَبِيْلًا ﴿٣٤﴾

जे लोक आपल्या तोंडावाटे, नरकाग्नीकडे जमा केले जातील, तेच वाईट ठिकाणावाले, आणि वाट चुकलेले आहेत ३४

وَلَقَدْ اٰتَيْنَا مُوْسَى الْكِتٰبَ وَجَعَلْنَا مَعَهٗٓ اَخَاهُ
هٰرُوْنَ وَزِيْرًا ﴿٣٥﴾

आणि खचितच आम्ही मूसाला पुस्तक दिले; आणि त्यांच्या बरोबर, त्यांचा भाऊ हारून यांस, त्यांचा मददगार बनवून दिले ३५

فَقُلْنَا اذْهَبَآ اِلَى الْقَوْمِ الَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا ۭ
فَدَمَّرْنٰهُمْ تَدْمِيْرًا ﴿٣٦﴾

आणि सांगून टाकले, की तुम्ही दोघे त्या लोकांकडे जा, जे आमच्या निशाण्यांना खोटे ठरवित आहेत. मग (आम्ही त्याला बिलकुल नष्ट करून टाकले) ३६

وَقَوْمَ نُوْحٍ لَّمَّا كَذَّبُوا الرُّسُلَ اَغْرَقْنٰهُمْ وَجَعَلْنٰهُمْ
لِلنَّاسِ اٰيَةً ۭ وَاَعْتَدْنَا لِلظّٰلِمِيْنَ عَذَابًا اَلِيْمًا ﴿٣٧﴾

आणि जेव्हा नूहच्या लोकांनी पण पैगंबरांना खोटे ठरविले, तेव्हांआम्ही त्यांना बुडवून टाकले. आणि लोकांसाठी त्यांना बोधाचे निशाण बनवनू टाकले. आणि आम्ही जालिम लोकांसाठी यातनादायक शिक्षा तयार करून ठेवली आहेत ३७

وَّعَادًا وَّثَمُوْدَا۟ وَاَصْحٰبَ الرَّسِّ وَقُرُوْنًۢا بَيْنَ ذٰلِكَ
كَثِيْرًا ﴿٣٨﴾

आणि 'आद' आणि 'समूद' आणि विहिरीवाल्यांना, [६] आणि त्यांच्या दर्म्यानच्या पुष्कळशा समूहांना (आम्ही नष्ट [७] करून टाकले) ३८

१) म्हणजे ज्याप्रमाणे हे मुहम्मद ﷺ तुझ्या समाजांतून, ते लोक तुझे शत्रू आहेत, ज्यांनी कुरआनाला सोडून दिले आहे; अशा प्रकारे मागील समूहामधून सुद्धा, होते; म्हणजे प्रत्येक पैगंबराचे शत्रू ते लोक असत, जे गुन्हेगार होते. ते लोकांना आडमार्गाकडे बोलावित असत. सू.अन्आम आ.११२ मध्ये सुद्धा, हा विषय वर्णन करण्यात आला आहे.

२) म्हणजे हे काफिर जरी, लोकांना अल्लाहच्या मार्गापासून अडवितात, परंतु तुझा पालनकर्ता ज्याला सन्मार्गाची बुद्धी देईल, त्याला हिदायतपासून कोण वांचवू शकतो ? खरा मार्गदर्शक आणि मददगार, तर तुझा पालनकर्ताच आहे.

३) ज्याप्रमाणे 'तौरात' 'इंजील' आणि 'जबूर' वगैरे पुस्तके, एकाच वेळी अवतरीत झालीत.

४) अल्लाहने उत्तरांत फर्माविले की, आम्ही स्थिती आणि आवश्यकतेनुसार, या कुरआनाला २३ वर्षांत थोडे थोडे करून उतारले की, हे पैगंबरा तुझे आणि ईमानवाल्यांचे मन मजबूत व्हावे. आणि त्यांच्या खूप लक्षांत राहून जावे. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आणि कुरआन, याला आम्ही वेगळे वेगळे केले; कारण की तू याला लोकांसमोर थांबून थांबून वांचावे. आणि आम्ही त्याला अंतरा अंतराने उतारले.'' (सू.बनी इस्राईल-१०६) अशाच प्रकारे कुरआनाची उपमा पावसासारखी आहे. पाऊस जेव्हांपण पडतो, मृत जमीन, जिवंत होऊन जाते. आणि फायदा विशेषत: त्यावेळी होतो, जेव्हा पाऊस वळो वेळी पडतो. हा फायदा सर्व पाऊस एकाच वेळी, पडून गेल्याने होत नाही.

५) हे कुरआनाचे अंतरा अंतराने उतरण्याचे प्रयोजन आणि कारण सांगण्यांत येत आहे की, मुशरिक लोक जेव्हांपण कोणी उदाहरण किंवा आक्षेप, आणि शंका पुढे करतील, तेव्हांआम्ही कुरआनाच्या मार्फत त्याचे उत्तर किंवा खुलासा सादर करून देऊं. आणि अशाप्रकारे त्यांना, लोकांना मार्गभ्रष्ट करण्याची संधी मिळणार नाही.

६) 'रस्स' चा अर्थ विहिरी आहे. 'असहाबे रस्स' विहिरीवाले. याच्या बाबतीत भाष्यकारांमध्ये मतभेद आहेत. इमाम इब्ने जरीर तबरीने म्हटले आहे की, याच्याने अभिप्रेत खंदकवाले आहेत. ज्याचा उल्लेख सू.बुरूज मध्ये, आहे. (इब्ने कसीर)

७) 'कर्न' चा खरा अर्थ आहे, समकालीन लोकांचा एक समूह. जेव्हा एका वंशाचे लोक संपून जातील, तर दुसरा वंश, दुसरा 'कर्न' म्हटला जाईल. (इब्ने कसीर) या अर्थांत, प्रत्येक पैगंबराची उम्मतपण, एक 'कर्न' पण होऊं शकते.

وَكُلًّا ضَرَبْنَا لَهُ الْأَمْثَالَ ۖ وَكُلًّا تَبَّرْنَا تَتْبِيرًا ﴿٣٩﴾

**आणि आम्ही त्यांच्यासमोर (अनेक) दृष्टांत वर्णन केले; [१] मग प्रत्येकाचा आम्ही नायनाट करून टाकला. [२] (३९)**

وَلَقَدْ أَتَوْا عَلَى الْقَرْيَةِ الَّتِي أُمْطِرَتْ مَطَرَ السَّوْءِ ۚ
أَفَلَمْ يَكُونُوا يَرَوْنَهَا ۚ بَلْ كَانُوا لَا يَرْجُونَ نُشُورًا ﴿٤٠﴾

**हे लोक या वस्तीच्या जवळून पण येत जात असतात.ज्यांच्यावर वाईट वर्षा केली गेली. [३] काय हे तरी सुद्धा त्याला पाहत नाही? हकीकत ही आहे की, त्यांना मरून, पुन्हा जिवंत उठण्याची धारणाच नाही. [४] (४०)**

وَإِذَا رَأَوْكَ إِنْ يَتَّخِذُونَكَ إِلَّا هُزُوًا أَهَٰذَا الَّذِي
بَعَثَ اللَّهُ رَسُولًا ﴿٤١﴾

**आणि तुम्हास जेव्हा कधी पाहतात, तेव्हा ते तुमची हंशीच उडवितात; काय हाच तो मनुष्य आहे, ज्याला अल्लाहतआलाने, पैगंबर बनवून पाठविले आहे. [५] (४१)**

إِنْ كَادَ لَيُضِلُّنَا عَنْ آلِهَتِنَا لَوْلَا أَنْ صَبَرْنَا عَلَيْهَا ۚ
وَسَوْفَ يَعْلَمُونَ حِينَ يَرَوْنَ الْعَذَابَ مَنْ أَضَلُّ
سَبِيلًا ﴿٤٢﴾

**(असे आहे की) आम्ही चिकाटीने अडून राहिलो, नाही तर त्यांनी आम्हास, आमच्या उपास्यांकडून बहकवून टाकण्यास कुठलीही कसर सोडली नव्हती [६] आणि हे जेव्हा शिक्षांना पाहतील, तर त्यांना स्पष्ट ठाऊक होऊन जाईल, की पूर्णपणे सरळ मार्गाने बहकलेला कोण होता? [७] (४२)**

أَرَأَيْتَ مَنِ اتَّخَذَ إِلَٰهَهُ هَوَاهُ أَفَأَنْتَ تَكُونُ عَلَيْهِ
وَكِيلًا ﴿٤٣﴾

**काय आपण त्याला पण पाहिले, ज्याने आपल्या मनोकामनेला आपला उपास्य बनवून ठेवला आहे; काय आपण त्याला जबाबदार होऊ शकता? [८] (४३)**

أَمْ تَحْسَبُ أَنَّ أَكْثَرَهُمْ يَسْمَعُونَ أَوْ يَعْقِلُونَ ۚ إِنْ هُمْ
إِلَّا كَالْأَنْعَامِ ۖ بَلْ هُمْ أَضَلُّ سَبِيلًا ﴿٤٤﴾

**काय आपण याच विचारांत आहात की, त्यांच्यातून बहुतेक ऐकतात किंवा समजतात? ते तर निव्वळ चतुष्पादांसारखे आहेत; किंबहुना त्यांच्याहून जास्त बहकलेले [९] (४४)**

أَلَمْ تَرَ إِلَىٰ رَبِّكَ كَيْفَ مَدَّ الظِّلَّ وَلَوْ شَاءَ لَجَعَلَهُ
سَاكِنًا ثُمَّ جَعَلْنَا الشَّمْسَ عَلَيْهِ دَلِيلًا ﴿٤٥﴾

**काय आपण पाहिले नाही की, तुमच्या पालनकर्त्याने, सांवलीला कशा प्रकारे पसरवून दिले आहे? [१०] (तो) जर इच्छिता, तर तिला एकाच जागी स्थिर ठेवता; [११] मग आम्ही सूर्याला तिचे मार्गदर्शक बनवून दिले [१२] (४५)**

ثُمَّ قَبَضْنَاهُ إِلَيْنَا قَبْضًا يَسِيرًا ﴿٤٦﴾

**नंतर आम्ही त्याला हळूहळू आपल्याकडे खेचून घेतले. [१३] (४६)**

وَهُوَ الَّذِي جَعَلَ لَكُمُ اللَّيْلَ لِبَاسًا وَالنَّوْمَ سُبَاتًا
وَجَعَلَ النَّهَارَ نُشُورًا ﴿٤٧﴾

**आणि तोच आहे, ज्याने रात्रीला तुमच्यासाठी पर्दापोश [१४] बनविले; आणि झोपेस विश्रांती बनविले [१५] आणि दिवसाला उठून उभे रहाण्याचा वेळ [१६] (४७)**

وَهُوَ الَّذِي أَرْسَلَ الرِّيَاحَ بُشْرًا بَيْنَ يَدَيْ رَحْمَتِهِ ۚ
وَأَنْزَلْنَا مِنَ السَّمَاءِ مَاءً طَهُورًا ﴿٤٨﴾

**आणि तोच आहे, जो रहमतच्या पावसाच्या पूर्वी, शुभसूचना देणाऱ्या वाऱ्यांना पाठवितो. आणि आम्ही आकाशांतून शुद्ध पाणी वर्षवितो. [१७] (४८)**

१) म्हणजे प्रमाणांच्या मार्फत आम्ही तर्क पूर्ण करून टाकला.

२) म्हणजे तर्क पूर्ण केल्यानंतर.

३) वस्तीने लूत عليه السلام चे लोक, सढूम आणि अमुरा वगैरे, अभिप्रेत आहेत. आणि वाईट वर्षेने, दगडांची वर्षा अभिप्रेत आहे. या वस्त्यांना उलटून टाकण्यात आले होते. आणि याच्यानंतर, त्यांच्यावर कडक दगडांची वर्षा केली गेली होती. जसे की सू. हूद आ. ८२ मध्ये सांगण्यात आले आहे. या वस्त्या सीरिया आणि पॅलेस्टाईनच्या मार्गांत पडतात. ज्यांच्यावर होऊनच मक्कावाले ये जा करीत असत.

४) म्हणून या नष्ट झालेल्या वस्त्या, आणि त्यांचे भग्नावशेष, पाहून सुद्धा, त्यापासून धडा घेत नाहीत. आणि अल्लाहच्या निशाण्या आणि अल्लाहच्या पैगंबरांना, खोटे ठरविण्यापासून माघार घेत नाहीत.

५) दुसऱ्या ठिकाणी अशा प्रकारे फर्माविले, ''काय हाच तो मनुष्य आहे. जो तुमच्या उपास्यांचा उल्लेख करितो.'' (सू.अंबिया-३६) म्हणजे याच्या बाबतीत म्हणतो की, ते काही अधिकार बाळगत नाहीत. या वास्तवतेला जाहीर करणेच, मुशरिक लोकांजवळ, त्यांच्या उपास्यांचा अपमान करणे होते. जसे आजपण कबरपुजकांना सांगितले जाईल की, कबरीत दफन झालेले

बुजूर्ग, विश्वांत हेरफेर करण्याचा अधिकार बाळगत नाहीत. तर म्हणतात की, हे अल्लाहच्या मित्रांशी उद्धटपणा करीत आहेत.
६) म्हणजे आम्हीच आपल्या वाडवडीलांचे अनुकरण, आणि पारंपारिक धर्माला संलग्न राहिल्याने, अल्लाह सोडून इतरांच्या उपासनेकडून, परावृत्त झालो नाहीत; नाहीतर या पैगंबराने आम्हांस बहकविण्यांत काहीच कसर बाकी ठेवली नव्हती. अल्लाहतआलाने मुशरिकांचे हे म्हणणे सांगून म्हटले की, अशा प्रकारे ते शिर्कवर अडून राहिले आहेत; की त्यांवर ते गर्व करीत आहेत.
७) म्हणजे या जगांत तर, मुशरिक लोकांना आणि अल्लाहशिवाय इतरांच्या पुजाऱ्यांना, एकेश्वरवादी लोक बहकलेले दिसतात. परंतु जेव्हा हे अल्लाहच्या दरबारांत पोहोचतील, आणि तेथे 'शिर्क' मुळे, अल्लाहच्या शिक्षेत ग्रस्त व्हावे लागेल, तेव्हा त्यांना ठाऊक होईल की, बहकलेला कोण होता ? एका अल्लाहची उपासना करणारे, किंवा ठायी ठायी आपल्या शिरांना झुकवणारे ?
८) म्हणजे जी गोष्ट त्याच्या मनोकामनेला चांगली वाटली, तिला आपला धर्म बनवून घेतला; काय अशा माणसाला तू सरळ मार्गावर आणूंशकतोस, किंवा अल्लाहच्या शिक्षेपासून सोडवूंशकतोस ? याला दुसऱ्या ठिकाणी अशा प्रकारे सांगितले, ''काय तो मनुष्य ज्याला त्याचे वाईट कृत्य सुशोभित करून देण्यांत आले, मग तो त्याला चांगले समजत आहे. तर, अल्लाहतआलाच ज्याला इच्छितो, मार्गभ्रष्ट करतो; आणि ज्याला इच्छितो त्याला सरळमार्गाला लावतो. म्हणूंन आपण त्यांच्यावर खेद आणि दु:ख करू नका.'' (सू.फातिर-८) ह.इब्ने अब्बास ﷺ याच्या भाष्यांत म्हणतात, अज्ञान काळामध्ये मनुष्य एका वेळपावेतो, पांढऱ्या दगडांची पुजा करीत असे. मग त्याला जेव्हा याच्यापेक्षा चांगला दगड दिसून येईल, तर पहिल्या दगडाला सोडून, दुसऱ्या दगडाची पुजा सुरू करून देत असे.'' (इब्ने कसीर) अर्थ हा आहे की, अशी माणसे जी बुद्धी आणि समजापासून रिक्त, आणि निव्वळ मनोकामनेला आपला उपास्य बनवून आहेत; हे पैगंबरा! काय आपण त्यांना हिदायतच्या मार्गाला लावू शकता? म्हणजे लाऊ शकत नाहीस.
९) म्हणजे हे चतुष्पाद ज्या उद्देशाने निर्माण केले गेले आहेत, त्याला ते समजतात. परंतु मनुष्य ज्याला फक्त एका अल्लाहच्या उपासनेसाठी निर्माण केले गेले होते तो पैगंबरांनी शिकवण दिल्यानंतर सुद्धा, अल्लाहबरोबर दुसऱ्यांना (त्याचा) सरकतदार ठरवितो. आणि जागोजागी आपले डोके टेकत फिरत आहे. या अनुषंगाने हे खचित्च चतुष्पादांपेक्षा जास्त वाईट आणि मार्गभ्रष्ट आहेत.
१०) येथून पुन्हा एकेश्वरवादाच्या प्रमाणांचा आरंभ होत आहे. पहा ! अल्लाहतआलाने विश्वामध्ये कशाप्रकारे सावली पसरवली आहे. जी उष:कालानंतर, सूर्योदय होईपर्यंत रहाते. म्हणजे यावेळी उन असत नाही. उन्हाबरोबर हे आकसून जाणे सुरू होऊन जाते.
११) म्हणजे जर नेहमी सावलीच राहती तर, सूर्याचे उन, सावलीला संपवून न टाकते.
१२) म्हणजे उन्हानेच सावलीचे ज्ञान होते. की प्रत्येक गोष्ट आपल्या उलट गोष्टीने ओळखली जाते. जर सूर्य नसतां, तर लोकांना सावलीचा पण परिचय झाला नसतां.
१३) म्हणजे ती सावली हळूंहळूंआम्ही आपल्याकडे ओढून घेतो. आणि तिच्या जागी रात्रीचा घनदाट अंध:कार आच्छादून जातो.
१४) म्हणजे पोषाख, ज्याप्रमाणे पोषाख, मानवी आकृतीला लपवून घेतो; त्याचप्रमाणे रात्र तुम्हाला आपल्या अंध:कारात लपवून घेते.
१५) सुबातचा अर्थ कापण्याचा होतो. झोप, माणसाच्या शरीराला कर्मापासून कापून देते. ज्यामुळे त्याला विश्रांती मिळते. काहींच्या जवळ 'सुबात' चा अर्थ ताणले जाणे आहे. झोपेत सुद्धा माणूस लांबलचक ताणून देतो. म्हणून त्याला सुबात म्हटले (अयसरूत तफासीर व फत्हुल कदीर)
१६) म्हणजे झोप, जी मृत्युची बहीण आहे, दिवसाला मनुष्य त्या झोपेतून जागा होऊन, कारभारी आणि व्यापारासाठी, पुन्हा उठून उभा रहातो. हदीसमध्ये येते की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, सकाळी जागे होत, तेव्हा ही दुआ म्हणत ''अल्हम्दु लिल्लहील लजी अह्याना बाद मा अमातना व इलैहिन् नुशूर'' (स.बुखारी) ''सर्व स्तुती त्या अल्लाहसाठी आहेत. ज्याने आम्हाला मृत्यूनंतर जिवंत केले. आणि त्याच्याचकडे एकत्र गोळा होणे आहे.''
१७) 'तहूर' म्हणजे अशी वस्तू जिच्याने स्वच्छता प्राप्त केली जाते. जसे वजुच्या पाण्याला 'वजुअ' आणि इंधनाला 'वकूद' म्हटले जाते. या अर्थांत पाणी 'ताहीर' (खुद्द पण पवित्र) आणि 'मुतहहीर' (दुसऱ्यांना पवित्र करणारा) पण आहे. हदीस मध्ये सुद्धांआहे, ''पाणी पाक आहे त्याला कोणी वस्तू नापाक करीत नाही.'' (अबु दाऊद, तिर्मिझी क्र.६६, निसाई, इब्ने माजा) परंतु जर त्याचा, रंग, वास, आणि चव बदलून जाईल तर असे पाणी अपवित्र आहे. कमा फिल हदीस.

لِّنُحْۦِيَ بِهٖ بَلْدَةً مَّيْتًا وَّ نُسْقِيَهٗ مِمَّا خَلَقْنَآ اَنْعَامًا وَّ اَنَاسِيَّ كَثِيْرًا ﴿٤٩﴾

कारण की याच्या मार्फत, मृत शहराला जिवंत करून द्यावे. आणि आम्ही आपल्या सृष्टीतून, पुष्कळसे चतुष्पाद आणि माणसांना (पाणी) पाजतो (४९)

وَلَقَدْ صَرَّفْنٰهُ بَيْنَهُمْ لِيَذَّكَّرُوْا ۖ فَاَبٰۤى اَكْثَرُ النَّاسِ اِلَّا كُفُوْرًا ﴿٥٠﴾

आणि नि:संशय आम्ही याला, यांच्या दर्म्यान, निरनिराळ्या प्रकारे वर्णन केले की, त्यांनी [१] उपदेश ग्रहण करावा. परंतु तरी सुद्धा बहुतेक लोकांनी अनुपकारा शिवाय मानले नाही. [२] (५०)

وَلَوْ شِئْنَا لَبَعَثْنَا فِيْ كُلِّ قَرْيَةٍ نَّذِيْرًا ﴿٥١﴾

आणि जर आम्ही इच्छितो, तर प्रत्येक वस्तीत एक भिवविणारा पाठविला असतां. [३] (५१)

فَلَا تُطِعِ الْكٰفِرِيْنَ وَجَاهِدْهُمْ بِهٖ جِهَادًا كَبِيْرًا ﴿٥٢﴾

तर तुम्ही काफिरांचे म्हणणे मानू नका. आणि कुरआनाच्या माध्यमातून त्यांच्याशी संपूर्ण ताकदीनिशी, मोठे जिहाद करा. [४] (५२)

وَهُوَ الَّذِيْ مَرَجَ الْبَحْرَيْنِ هٰذَا عَذْبٌ فُرَاتٌ وَّهٰذَا مِلْحٌ اُجَاجٌ ۚ وَجَعَلَ بَيْنَهُمَا بَرْزَخًا وَّحِجْرًا مَّحْجُوْرًا ﴿٥٣﴾

आणि तोच आहे, ज्याने दोन समुद्र आपसांत मिळवून ठेवले आहे; एक गोड स्वादिष्ट पाण्याचा, आणि खारा कडू; [५] आणि दोहोच्या दर्म्यान एक अडकण आणि अटळ तट बनवून दिला [६] (५३)

وَهُوَ الَّذِيْ خَلَقَ مِنَ الْمَآءِ بَشَرًا فَجَعَلَهٗ نَسَبًا وَّصِهْرًا ؕ وَكَانَ رَبُّكَ قَدِيْرًا ﴿٥٤﴾

आणि तो आहे, ज्याने पाण्यापासून, मनुष्याला निर्माण केले; मग त्याला एक वंश आणि एका सासुरवाडीच्या नात्यावाला करून दिले; [७] नि:संशय तुमचा पालनकर्ता, सर्व सामर्थवान आहे. (५४)

وَيَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ مَا لَا يَنْفَعُهُمْ وَلَا يَضُرُّهُمْ ؕ وَكَانَ الْكَافِرُ عَلٰى رَبِّهٖ ظَهِيْرًا ﴿٥٥﴾

आणि हे अल्लाहला सोडून त्यांची उपासना करतात, जे न त्यांना काही नफा देऊ शकतात, न काही नुकसान पोहचवू शकतात. आणि काफिर तर आहेच आपल्या पालनकर्त्याकडे पाठ फिरवणारा (५५)

وَمَآ اَرْسَلْنٰكَ اِلَّا مُبَشِّرًا وَّنَذِيْرًا ﴿٥٦﴾

आणि आम्ही तर आपणांस शुभवार्ता देणारा आणि भिवविणारा बनवून पाठविला आहे. (५६)

قُلْ مَآ اَسْـَٔلُكُمْ عَلَيْهِ مِنْ اَجْرٍ اِلَّا مَنْ شَآءَ اَنْ يَّتَّخِذَ اِلٰى رَبِّهٖ سَبِيْلًا ﴿٥٧﴾

आणि आपण सांगून टाका की, (मी) कुरआन पोहोचविण्याबद्दल तुमच्याकडून काही बदला तर मागत नाही; परंतु जो मनुष्य, आपल्या पालनकर्त्याकडे मार्ग धरू इच्छेल [८] (५७)

وَتَوَكَّلْ عَلَى الْحَيِّ الَّذِيْ لَا يَمُوْتُ وَسَبِّحْ بِحَمْدِهٖ ؕ وَكَفٰى بِهٖ بِذُنُوْبِ عِبَادِهٖ خَبِيْرًا ﴿٥٨﴾

त्या नेहमी जिवंत राहणाऱ्या अल्लाहवर भरोसा ठेवा, ज्याला कधी मृत्यु नाही; आणि त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्य वर्णन करीत रहा; तो आपल्या सेवकांच्या पापांशी पुरेसा माहितगार आहे. (५८)

اِلَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا فِيْ سِتَّةِ اَيَّامٍ ثُمَّ اسْتَوٰى عَلَى الْعَرْشِ ۚ اَلرَّحْمٰنُ فَسْـَٔلْ بِهٖ خَبِيْرًا ﴿٥٩﴾

तोच आहे ज्याने आकाश आणि पृथ्वी, आणि त्यांच्या दर्म्यान सर्व वस्तू सहा दिवसांतच निर्माण करून दिल्या आहेत; मग महासिंहासनावर विराजमान झाला. तो परम दयाळू आहे, तुम्ही त्याच्या बाबतीत कोण्या जाणकारालाच विचारून घ्या (५९)

وَاِذَا قِيْلَ لَهُمُ اسْجُدُوْا لِلرَّحْمٰنِ قَالُوْا وَمَا الرَّحْمٰنُ ۗ اَنَسْجُدُ لِمَا تَاْمُرُنَا وَزَادَهُمْ نُفُوْرًا ﴿٦٠﴾ السجدة

यांना जेव्हा पण सांगण्यांत येते, की त्या परम दयाळू (अल्लाह) ला सज्दा करा, तर उत्तर देतात, की परम दयाळू आहे काय? काय आम्ही त्याला सज्दा करावा, ज्याचा तू हुकूम करावा, आणि त्यांचा दुराग्रह [९] आणखीही वाढतो (६०)

१) म्हणजे कुरआन करीमला ज्याचा अर्थ हा होईल की, पावसाला आम्ही पुन्हा पुन्हा वर्षवितो. म्हणजे कधी एका इलाख्यांत कधी दुसऱ्या इलाख्यांत येथ पावेतो की, कधी कधी असे पण होते की, कधी एका शहराच्या एका भागांत पाऊस पडतो, आणि दुसऱ्यांत पडत नाही. आणि कधी दुसऱ्या भागांत पाऊस पडतो, आणि पहिल्या भागांत पडत नाही. हे अल्लाहचे प्रयोजन आणि मर्जी आहे, तो ज्याप्रमाणे इच्छितो, कोठे पाऊस पाडतो आणि कोठे नाही. आणि कधी कोण्या इलाख्यांत आणि कधी कोण्या (दुसऱ्या) इलाख्यांत.

२) आणि एक नाकारणे, आणि अनुपकार, हा पण आहे की, पाऊस अल्लाहच्या मर्जीशिवाय, ग्रहताऱ्यांच्या फिरण्याचा परिणाम ठरविला जावा. जसे अज्ञान काळांतील लोक म्हणत असत. कमा फिल् हदीस. हदीशीमध्ये या श्रध्देला 'कुफ्र'ने संबोधित केले आहे.

३) परंतु आम्ही असे केले नाही; आणि फक्त तुम्हासच सर्व वस्त्यांकडे, किंबहुना, सकल मानव जातीसाठी, भिवविणारा बनवून पाठविले आहे.

४) म्हणजे या कुरआनाच्या मार्फत जिहाद करावे. हे महावाक्य मक्केत अवतीर्ण झाले आहे. आतांपर्यंत जिहादचा हुकूम मिळाला नव्हतां. यासाठी अर्थ हा झाला की, कुरआनाचे आदेश स्पष्ट करून सांगावेत. आणि काफिरांसाठी ज्या कानउघाडण्या, तंब्या आणि धमक्या आहेत त्या स्पष्ट कराव्यांत.

५) गोड्या पाण्याला 'फुरात' म्हणतात. 'फुरात' चा अर्थ आहे कापून टांकणे, तोडून टाकणे; गोडे पाणी, तहानेला कापून टाकते म्हणजे संपवून टाकते. 'उजाज्' फारच खारट किंवा कडू.

६) जी एकाला दुसऱ्याशी मिळू देत नाही. कांहींनी 'हिजरम् महजुरा' चा अर्थ केला आहे, 'हरामन् मुहर्रमन', त्यांच्यावर हराम करून देण्यांत आले आहे की, गोडे पाणी खारे, किंवा खारे पाणी गोड होऊन जावे. आणि काही भाष्यकारांनी, 'मरजल बहरैने' चे भाषांतर केले आहे, 'खलकल् माऐने' दोन पाणी निर्माण केले. एक गोडे दुसरे खारे. गोडे पाणी तर ते आहे, जे पाटांत, झऱ्यांत आणि विहिरीच्या स्वरूपांत, वस्त्यांमध्ये आढळून येते. ज्याचा मनुष्य आपल्या आवश्यकतेनुसार उपयोग करतो. आणि खारे पाणी ते आहे, जे मोठमोठ्या समुद्रांत आहे. जो पृथ्वीचा तीन चतुर्थांस भाग आहे, आणि एक चतुर्थांस कोरड्या (जमिनी) चा आहे, ज्यात माणसे आणि प्राणी राहतात. हे समुद्र स्थिर आहेत; तथापि त्याच्यांत भरती ओहोटी होत असते, आणि लाटांचे उसळणे चालू असते. समुद्री पाण्याचे खारे रहाण्यांत, अल्लाहतआलाचे मोठे प्रयोजन आहे. गोडे पाणी जास्त वेळपर्यंत कोठे थांबून राहील, तर ते खराब होऊन जाते. त्याच्या चवीत, रंगात किंवा वासांत बदल होऊन जातो. खारे पाणी खराब होत नाही. त्याची चव बदलत नाही, न रंग, न वास. जर या स्थिर समुद्रांचे पाणी पण गोडे असते तर त्याच्यात दुर्गंधी निर्माण झाली असती. ज्यामुळे मनुष्यांचे आणि प्राण्यांचे जमिनीवर रहाणे कठीण होऊन गेले असते. याच्यात मरणाऱ्या जनावरांची दुर्गंधी, याहून आणखी जास्त. अल्लाहची युक्ती तर ही आहे की, हजारो वर्षांपासून हे समुद्र अस्तित्वांत आहेत, आणि त्यांच्यात हजारो प्राणी मरतात; आणि त्यांच्यात गळून सडून जातात, परंतु अल्लाहने त्यांच्यात खारेपणाचे एवढे प्रमाण ठेवले आहे की, ते याच्या पाण्यांत जरा पण दुर्गंध निर्माण होऊ देत नाही. त्यांच्यावरून येणारा वारा पण बरोबर आहे. त्यांचे पाणी पवित्र आहे, येथपावेतो की त्यांचा मुर्दाडपणा हलाल (विहीत) आहे. कमा फिल हदीस. (मौता इमान मालिक, इब्ने माजा, अबुदाऊद, तिर्मिझी) (तफसीर इब्ने कसीर.)

७) वंशाने अभिप्रेत ते नातेसंबंध आहेत, जे वडीलाकडून किंवा आईकडून असावेत. सिहरने अभिप्रेत ते नातेसंबंध आहेत, जे लग्नानंतर पत्नीकडून असावेत. ज्यांना आमच्या भाषेत, ''सासरकडून नातेसंबंध'' म्हटले जाते. या दोन्ही नाते संबंधाचा तपशील, महावाक्य 'हुर्रिमत अलैकुम' (सू.निसाअ-२३) आणि ''वला तनकेहु मानकह आबा अकुम'' (सू.निसाअ-२२) मध्ये सांगून देण्यांत आला आहे. आणि दूध पाजण्याचे नातेसंबंध, हदीसच्या अनुषंगाने, वांशिक नाते संबंधात शामील आहेत. जसे की सांगितले,जे नातेसंबंध वांशिकदृष्टच्या हराम असतात, दूध पाजल्याने देखील हरामच होतात. (बुखारी क्र.२६४५ व मुस्लीम क्र.१०७०)

८) म्हणजे हाच माझा मोबदला आहे की, अल्लाहचा मार्ग अंगीकारून घ्या.

९) रहमान, रहीम अल्लाहतआलाची विशेषणे आणि त्याची उत्कृष्ट नांवे आहेत. परंतु अज्ञानी लोक त्याला या नांवानी ओळखत नव्हते. जसे की, हुदैबियाच्या तहाच्या वेळी, जेव्हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी, तहाच्या सुरवातीला, बिसमिल्लाह ईर्रहमान इर्रहीम, लिहविले; तेव्हा मक्केच्या मुशरिक लोकांनी सांगितले, आम्ही रहमान व रहीमला ओळखत नाहीत. 'बिस्मेका अल्लाह हुमा' लिहा. (सिरत इब्ने हिश्शाम ३१७/२) आणखी पहावे सू.बनी इस्राईल-११०, सू.रअद-३०, येथे पण त्यांचे रहमानच्या नांवाने बिदकणे, आणि सजदा करण्यापासून पळ काढण्याचा उल्लेख आहे.

تَبٰرَكَ الَّذِیْ جَعَلَ فِی السَّمَآءِ بُرُوْجًا وَّ جَعَلَ فِیْهَا سِرٰجًا وَّ قَمَرًا مُّنِیْرًا ﴿٦١﴾

**धन्य आहे तो, ज्याने आकाशांत मोठे मोठे तारे बनविले, [१] आणि त्याच्यांत सूर्य बनवला आणि प्रकाशमान चंद्र सुद्धा ६१**

وَ هُوَ الَّذِیْ جَعَلَ الَّیْلَ وَ النَّهَارَ خِلْفَةً لِّمَنْ اَرَادَ اَنْ یَّذَّكَّرَ اَوْ اَرَادَ شُكُوْرًا ﴿٦٢﴾

**आणि त्यानेच रात्र आणि दिवसाला, एक दुसऱ्याचे मागून येणारे बनविले. [२] त्या माणसाच्या उपदेशासाठी, जो उपदेश ग्रहण करण्याचा किंवा, कृतज्ञता दर्शविण्याचा इरादा बाळगतो ६२**

وَ عِبَادُ الرَّحْمٰنِ الَّذِیْنَ یَمْشُوْنَ عَلَى الْاَرْضِ هَوْنًا وَّ اِذَا خَاطَبَهُمُ الْجٰهِلُوْنَ قَالُوْا سَلٰمًا ﴿٦٣﴾

**आणि रहमान (परम दयाळू) चे (खरे) सेवक ते आहेत, जे जमिनीवर नम्रतेने चालतात. आणि जेव्हा अज्ञानी लोक त्यांच्याशी गोष्टी करू लागतात, तर ते सांगून टाकतात की (तुम्हांस) सलाम आहे. [३] ६३**

وَ الَّذِیْنَ یَبِیْتُوْنَ لِرَبِّهِمْ سُجَّدًا وَّ قِیَامًا ﴿٦٤﴾

**आणि जेव्हा ते आपल्या पालनकर्त्यासमोर सजदा करताना आणि उभे रहातांना, रात्री घालवून देतात ६४**

وَ الَّذِیْنَ یَقُوْلُوْنَ رَبَّنَا اصْرِفْ عَنَّا عَذَابَ جَهَنَّمَ ۖۗ اِنَّ عَذَابَهَا كَانَ غَرَامًا ﴿٦٥﴾

**आणि जे प्रार्थना करतात की, हे आमच्या पालनकर्त्या! नरकाग्नीची शिक्षा तू आमच्यापासून दूरच दूर ठेव. कारण की तिची शिक्षा बिलकूल बिलगून जाणारी आहे. [४] ६५**

اِنَّهَا سَآءَتْ مُسْتَقَرًّا وَّ مُقَامًا ﴿٦٦﴾

**नि:संशय ती राहण्याच्या आणि थांबण्याच्या दृष्टीने फारच वाईट जागा आहे. ६६**

१) 'बुरूज' 'बुर्ज' चे अनेक वचन आहे. सल्फच्या भाष्यांत, 'बुरूज' ने अभिप्रेत मोठे मोठे तारे घेण्यांत आले आहेत. आणि या अर्थावर, अल्लाहची वाणी, स्पष्ट आहे की, खुपच शुभकारक आहे ते व्यक्तित्व, ज्याने आकाशांत मोठे मोठे ग्रह तारे बनविले आणि सूर्य व चंद्र बनविले. नंतरच्या भाष्यकारांनी, याच्याने ज्योतिष्यवाल्यांच्या, राशी अभिप्रेत धरल्या आहेत. आणि या बारा राशी आहेत. कर्क, मिथून, कन्या, वृषभ, वृश्चिक, कुंभ, तूळ, सिंह, मेष, धनु,मकर, मिन आणि या राशी, सात मोठ्या ग्रहांच्या कक्षा आहेत; ज्यांची नांवे आहे, मंगळ, शुक्र, शनी, चंद्र, सूर्य, गुरू, आणि बुध हे तारे, राशीमध्ये, अशाप्रकारे उतरतात, जसे हे त्यांच्यासाठी आलिशान महाल आहेत.

२) म्हणजे रात्र सरते तर दिवस येऊन लागतो; आणि दिवस येतो तर रात्र चालली जाते. दोन्ही एकाच वेळी जमा होत नाही. याचे फायदे आणि प्रयोजने, यांचा खुलासा करण्याची आवश्यकता नाही. काहींनी 'खिलफतन' चा अर्थ, एक दुसऱ्याच्या विरूद्ध केला आहे. म्हणजे रात्र अंधारी आहे, तर दिवस प्रकाशमान.

३) सलाम ने अभिप्रेत येथे, नजरअंदाज करणे आणि वादविवाद टाळणे, आणि भांडण न करणे,घेतले आहे. म्हणजे ईमानवाले अज्ञानी आणि मूर्ख लोकांशी, वादविवाद करीत नाही; किंबहुना अशा प्रसंगी, लक्ष न देणे, व विसरण्याची पॉलिसी अंगीकारतात. आणि ज्यापासून काही फायदा नाही असे वादविवाद करीत नाहीत.

४) याच्याने ठाऊक झाले की रहमानचे सेवक ते आहेत, जे एकीकडे रात्रीला उठून, अल्लाहची उपासना करतात आणि दुसऱ्या बाजूने जे भितपण असतात की कोठे कोणी चूक किंवा कोताईवर (आम्ही) अल्लाहतआलाच्या पकडीवर न येऊन जावोत. म्हणून ते नरकाग्नीच्या शिक्षेपासून, अल्लाहचा आश्रय मागीत असतात. जणूंअल्लाहच्या उपासना आणि आज्ञापालन करून सुद्धा, अल्लाहची शिक्षा आणि त्याच्या पकडीपासून, मनुष्याला निर्भय, आणि आपल्या, अल्लाहची उपासना आणि आज्ञापालनावर, कोण्या गर्व आणि अहंकारात व्यस्त व्हावयांस नको. याच भावार्थाला दुसऱ्या ठिकाणी, अशाप्रकारे सांगण्यात आले आहे, ''आणि ते लोक जे देतात. आणि जे काही देतात त्यांची अंत:करणे भितात की, ते आपल्या पालनकर्त्याकडे परतून जाणार आहेत.'' (सू.अल्मोमिनुन-६०) भीती फक्त या गोष्टीची नाही की, त्यांना अल्लाहच्या समक्ष हजर व्हावयाचे आहे; किंबहुना याच्याबरोबरच, याचे पण की त्यांचा दानधर्म कबूल होतो किंवा नाही? हदीस मध्ये महावाक्याच्या भाष्यांत येते की, ह.आयेशा ﵂ ने, रसूलुल्लाह् ﷺ ला या महावाक्याबाबत विचारले, की, काय, याच्याने अभिप्रेत ते लोक आहेत, जे मद्य प्राशन करतात आणि चोरी करतात? आपण ﷺ नी फर्माविले, ''नाही! हे अबुबकरच्या मुली!! किंबहुना ते लोक आहेत, जे उपवास ठेवतात, नमाज पढतात, आणि दानधर्म करतात; परंतु यावर सुद्धा भितात की, कोठे त्यांची ही कर्मे अमान्य न होऊन जावीत.'' (जामए तिर्मिझी, किताबुल तफसीर, सू.मोमिनून)

وَالَّذِيْنَ اِذَآ اَنْفَقُوْا لَمْ يُسْرِفُوْا وَلَمْ يَقْتُرُوْا وَكَانَ بَيْنَ ذٰلِكَ قَوَامًا ﴿٦٧﴾

आणि जे खर्च करतांना, उधळपट्टी करीत नाही न कंजुषी किंबहुना दोहोंच्या दर्म्यान मध्यम मार्ग असतो.[१] (६७)

وَالَّذِيْنَ لَا يَدْعُوْنَ مَعَ اللّٰهِ اِلٰهًا اٰخَرَ وَلَا يَقْتُلُوْنَ النَّفْسَ الَّتِيْ حَرَّمَ اللّٰهُ اِلَّا بِالْحَقِّ وَلَا يَزْنُوْنَ ۚ وَمَنْ يَّفْعَلْ ذٰلِكَ يَلْقَ اَثَامًا ﴿٦٨﴾

आणि जे अल्लाहच्या बरोबर, दुसऱ्या कोण्या उपास्याला बोलावित नाही; आणि कोण्या अशा माणसाला ज्याला ठार मारणे, अल्लाहतआलाने मना करून टाकले असेल, ते हक्काशिवाय ठार करीत नाहीत.[२] न ते व्याभिचार करतात; आणि[३] जो कोणी ही कामे करीन, तो आपल्यावरच फारच दुष्परीणाम आणिन. (६८)

يُّضٰعَفْ لَهُ الْعَذَابُ يَوْمَ الْقِيٰمَةِ وَيَخْلُدْ فِيْهٖ مُهَانًا ﴿٦٩﴾

त्याला कयामतच्या दिवशी दुहेरी शिक्षा दिली जाईल. आणि तो क्षुल्लक होऊन त्याच स्थितीत नेहमी राहील (६९)

اِلَّا مَنْ تَابَ وَاٰمَنَ وَعَمِلَ عَمَلًا صَالِحًا فَاُولٰٓئِكَ يُبَدِّلُ اللّٰهُ سَيِّاٰتِهِمْ حَسَنٰتٍ ؕ وَكَانَ اللّٰهُ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿٧٠﴾

त्या लोकांशिवाय, जे पश्चात्ताप व्यक्त करतील, आणि ईमान आणतील, आणि चांगली कामे करतील.[४] अशा लोकांच्या पापांना अल्लाहतआला सुकृत्यांत बदलवून देईल.[५] आणि अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (७०)

وَمَنْ تَابَ وَعَمِلَ صَالِحًا فَاِنَّهٗ يَتُوْبُ اِلَى اللّٰهِ مَتَابًا ﴿٧١﴾

आणि जो मनुष्य पश्चात्ताप व्यक्त करेल, आणि चांगली कामे करेल, तर तो (खरोखरीच) अल्लाहतआलाकडे वळतो[६] (७१)

وَالَّذِيْنَ لَا يَشْهَدُوْنَ الزُّوْرَ ۙ وَاِذَا مَرُّوْا بِاللَّغْوِ مَرُّوْا كِرَامًا ﴿٧٢﴾

आणि जे लोक खोटी साक्ष देत नाहीत,[७] आणि जेव्हा कोण्या निरर्थक गोष्टी जवळून जातात, तेव्हा ते शिष्टाचाराने निघून जातात[८] (७२)

وَالَّذِيْنَ اِذَا ذُكِّرُوْا بِاٰيٰتِ رَبِّهِمْ لَمْ يَخِرُّوْا عَلَيْهَا صُمًّا وَّعُمْيَانًا ﴿٧٣﴾

आणि जेव्हा त्यांना त्यांच्या पालनकर्त्याची महावाक्ये ऐकविली जातात, तेव्हा आंधळे बहिरे होऊन, त्यावर पडत नाही.[९] (७३)

وَالَّذِيْنَ يَقُوْلُوْنَ رَبَّنَا هَبْ لَنَا مِنْ اَزْوَاجِنَا وَذُرِّيّٰتِنَا قُرَّةَ اَعْيُنٍ وَّاجْعَلْنَا لِلْمُتَّقِيْنَ اِمَامًا ﴿٧٤﴾

आणि ही प्रार्थना करता की हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हास आमच्या पत्नीकडून आणि संततीकडून, डोळे गार होतील असे कर;[१०] आणि आम्हांस तुला भिणाऱ्या लोकांचा पुढारी बनीव[११] (७४)

اُولٰٓئِكَ يُجْزَوْنَ الْغُرْفَةَ بِمَا صَبَرُوْا وَيُلَقَّوْنَ فِيْهَا تَحِيَّةً وَّسَلٰمًا ۙ ﴿٧٥﴾

हेच ते लोक आहेत, ज्यांना त्यांच्या सहनशिलतेबद्दल, स्वर्गाचे, उच्च प्रतिचे सज्जे दिले जातील, जेथे त्यांना आशीर्वाद आणि सलाम पोहचवला जाईल (७५)

خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ حَسُنَتْ مُسْتَقَرًّا وَّمُقَامًا ﴿٧٦﴾

त्यांतच ते नेहमी राहतील. ती फारच चांगली जागा, आणि उत्तम स्थळ आहे. (७६)

قُلْ مَا يَعْبَؤُا بِكُمْ رَبِّيْ لَوْلَا دُعَآؤُكُمْ ۚ فَقَدْ كَذَّبْتُمْ فَسَوْفَ يَكُوْنُ لِزَامًا ﴿٧٧﴾

(आपण) सांगून द्या! जर तुमची प्रार्थना, विनवणी नसती, तर माझ्या पालनकर्त्याने तुमची काही पर्वा केली नसती.[१२] तुम्ही तर खोटे ठरवून चुकला आहात. आता लवकरच त्याची शिक्षा तुम्हावर येऊन बिलगणारी होईल.[१३] (७७)

१) अल्लाहच्या आज्ञाभंगात खर्च करणे, उधळपट्टी आणि अल्लाहच्या आज्ञापालनांत खर्च न करणे, कंजुषी; आणि अल्लाहचे आदेश आणि आज्ञेप्रमाणे खर्च करणे, खरे खर्च करणे आहे. (फत्हुल कदीर) अशाच प्रकारे, आवश्यक खाणे पिणे आणि कपड्यांवर, आणि आवश्यकतांवर, मर्यादेच्या बाहेर खर्च करणे पण उधळपट्टीत येऊं शकते. म्हणून तेथे सुद्धा काळजी घेणे आणि मध्यम मार्गाचा अवलंब करणे फारच जरूरी आहे.

२) आणि हक्कासह ठार मारण्याची तीन स्वरूपे आहेत. इस्लाम स्वीकारल्यानंतर कोणी दुसऱ्यांदा, कुफ्रचा अंगीकार करेल; ज्याला फिरवून जाणे (मुरतद्द) म्हणतात; किंवा विवाहीत असून व्याभिचार करेल; किंवा कोणास मारून टाकेल; या स्वरूपांत ठार मारले जाईल.

३) हदीसमध्ये आहे, रसूलुल्लाह ﷺ ला, प्रश्न करण्यात आला, कोणता गुनाह सर्वांत मोठा आहे? आपण ﷺ नी फर्माविले हे की, तू अल्लाहबरोबर कोणाला सरकतदार ठरवशील; वास्तविक त्याने तुला निर्माण केले. त्याने विचारले याच्यानंतर, कोणता गुनाह मोठा आहे? (आपण) फर्माविले की, आपल्या संततीला या भीतीने ठार करणे की, ती तुझ्या बरोबर खाईल. त्याने विचारले मग कोणता ? आपण ﷺ नी फर्माविले की, तूंआपल्या शेजाऱ्यांच्या बायकोशी व्याभिचार करावा. मग आपण ﷺ नी फर्माविले की, या गोष्टीची मान्यता, या महावाक्याने होत आहे. मग आपण ﷺ नी हेच महावाक्य पठण केले. (अल् बुखारी तफसीर सू.बकरः, मुस्लिम)

४) याने ठाऊक झाले या इहलोकांत, निखालस पश्चात्ताप व्यक्त केल्याने, प्रत्येक गुनाह माफ होऊं शकतो. मग तो किती का वाईट असेना ! आणि सू.निसाअ च्या आ.९३ मध्ये, जी ईमानवाल्याला ठार करण्याची शिक्षां, नरकाग्नी सांगण्यांत आली आहेत तर ती या स्वरूपांत लागू होईल की, ठार करणाऱ्याने तौबा केली नसेल. आणि तौबा केल्याशिवायच मरण पावला असेल. नाहीतर हदीसमध्ये येते की, शंभर माणसांना पण ठार करणाऱ्याने निखालस तौबा केली, तर अल्लाहतआलाने त्याला क्षमा करून टाकले. (स.मुस्लिम, किताबुत् तौबा)

५) याचा एक अर्थ तर हा आहे की, अल्लाहतआला त्याची स्थिती बदलवून टाकतो; इस्लाम कबूल करण्यापूर्वी तो कुकृत्ये करीत होता. आता सुकृत्ये करतो. पूर्वी शिर्क करीत असे, आता फक्त, एकट्या अल्लाहची उपासना करतो. पूर्वी काफिरांबरोबर मिळून, मुसलमानांबरोबर लढत होता. आता मुसलमानांकडून काफिरांशी लढतो. वगैरे, वगैरे. दुसरा अर्थ आहे की,त्याच्या कुकृत्यांना सुकृत्यांत बदलवून देण्यात येते. याचे समर्थन हदीसने पण होते. रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''मी त्या मनुष्याला ओळखतो, जो सर्वात शेवटी, स्वर्गांत दाखल होणारा, आणि सर्वांच्या शेवटी, नरकाग्नीतून, निघणारा असेल. हा तो मनुष्य असेल की, कयामतच्या दिवशी, त्याचेवर त्याचे लहान लहान गुन्हे सादर केले जातील, मोठे गुन्हे एका बाजूला ठेवून दिले जातील. त्याला सांगण्यांत येईल की तू अमक्या अमक्या दिवशी, अमुक अमुक काम केले होते? तो होकारार्थी उत्तर देईल. नाकारण्याची त्याची हिंमत असणार नाही. याशिवाय, तो या गोष्टीकडून सुद्धा भित असेल, आतांतर मोठे गुन्हेपण पेश केले जातील. तेव्हा इतक्यांत त्याला सांगण्यात येईल की, जा! तुझ्या करीता प्रत्येक कुकृत्याच्या बदल्यांत, एक सुकृत्य आहे. अल्लाहची ही कृपा पाहून, तो म्हणेल की, अजून तर माझी पुष्कळशी कर्मे अशी आहेत ज्यांना मी तेथे पाहत नाही. असे सांगून रसूलुल्लाहु ﷺ, हंसले, येथ पावेतो की, आपले दांत दिसू लागले.'' (स.मुस्लिम)

६) पहिल्या तौबा चा संबंध कुफ्र आणि शिर्कशी आहे. या तौबाचा संबंध दुसरे गुनाह आणि कोतायांशी आहे.

७) 'जूर' चा अर्थ खोट्याचा आहे. प्रत्येक निरर्थक गोष्टपण, खोटी आहे. म्हणून खोट्या साक्षीपासून, कुफ्र आणि शिर्क, प्रत्येक प्रकारच्या वाईट गोष्टी, उदाहरणार्थ खेळ, तमाशा, गाणे आणि दुसऱ्या बेहुदा अज्ञानीपणाचे रितीरिवाज, आणि कर्मे सर्व याच्यांत जमा आहेत. आणि अल्लाहच्या सेवकांचे हे लक्षण पण आहे की, कोणत्याही खोट्यांत आणि खोट्यांच्या सभांमध्ये हजर राहत नाहीत.

८) 'लग्व', प्रत्येक ती गोष्ट आणि काम आहे, ज्यात धर्मशास्त्राच्या दृष्टीने, काही फायदा नाही. म्हणजे अशा कामांत आणि गोष्टींत पण ते सहभागी होत नाही. किंबहुना काही न बोलता, प्रतिष्ठीत पणे, तेथून निघून जातात.

९) म्हणजे ते याला टाळत नाही आणि त्याच्याकडे दुर्लक्ष करीत नाही; जसे ते बहिरे असावे की, ऐकूंच नये; किंवा आंधळे असावे की, पाहूंच नये. किंबहुना ते काळजीपूर्वक लक्ष देऊन ऐकतात आणि त्यांना मनामध्ये सांठवून ठेवतात.

१०) म्हणजे त्यांना आपला पण आज्ञाधारक बनव, आणि आमची पण आज्ञा पाळणारे ज्यामुळे आमचे डोळे गार व्हावेत.

११) म्हणजे असा चांगला नमुना की चांगल्या कामांत, त्यांनी आमचे अनुकरण करावे.

१२) प्रार्थना आणि विनवणीचा अर्थ, अल्लाहचा धांवा करणे, आणि त्याची उपासना करणे आहे. आणि अर्थ हा आहे की, तुमच्या निर्मितीचा उद्देश्य अल्लाहची उपासना आहे. जर असे नसेल तर अल्लाहला तुमची काही पर्वा नाही. म्हणजे अल्लाहजवळ माणसाची कदर आणि किंमत, त्याचे अल्लाहवर ईमान आणणे, आणि त्याची उपासना केल्यामुळे आहे.

१३) याच्यात काफिरांना संबोधन आहे की, तुम्ही अल्लाहला खोटे ठरविले आहे. तर आता त्याची शिक्षापण तुम्हास अवश्य चाखावी लागणार आहे. म्हणून इहलोकांत ही शिक्षा, बद्रच्या अपयशाच्या स्वरूपांत, त्यांना मिळाली; आणि परलोकांत नरकाग्नीच्या कायमच्या शिक्षेत त्यांना ग्रस्त व्हावे लागणार.

# (२६) सू. शूअरा

महावाक्ये २२७ | रुकूअ ११

آياتها ٢٢٧ | (٢٦) سُورَةُ الشُّعَرَاءِ مَكِّيَّةٌ (٤٧) | ركوعاتها ١١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

طٰسٓمّٓ ①

*ता-सीन-मीम* ①

تِلْكَ اٰيٰتُ الْكِتٰبِ الْمُبِيْنِ ②

ही महावाक्ये प्रकाशमान पुस्तकाची आहेत ②

لَعَلَّكَ بَاخِعٌ نَّفْسَكَ اَلَّا يَكُوْنُوْا مُؤْمِنِيْنَ ③

त्यांच्या ईमान न आणण्याने कदाचित् आपण आपले प्राण घालवून बसणार[१] ③

اِنْ نَّشَاْ نُنَزِّلْ عَلَيْهِمْ مِّنَ السَّمَآءِ اٰيَةً فَظَلَّتْ اَعْنَاقُهُمْ لَهَا خٰضِعِيْنَ ④

जर आम्ही इच्छितो तर, यांच्यावर आकाशांतून कोणी अशी निशाणी उतारतो की, जिच्या समोर यांच्या माना झुकून गेल्या असत्या[२] ④

وَمَا يَاْتِيْهِمْ مِّنْ ذِكْرٍ مِّنَ الرَّحْمٰنِ مُحْدَثٍ اِلَّا كَانُوْا عَنْهُ مُعْرِضِيْنَ ⑤

आणि यांचे जवळ रहमान (परम दयाळू) कडून, जो पण नवीन उपदेश आला, त्याच्यापासून तोंड फिरविणारे बनून गेलेत ⑤

فَقَدْ كَذَّبُوْا فَسَيَاْتِيْهِمْ اَنْۢبٰٓؤُا مَا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ⑥

या लोकांनी (याला) खोटे ठरविले आहे, आता त्यांच्याजवळ लवकरच त्याच्या बातम्या येऊन लागतील, ज्यांची ते हंशी उडवित आहेत[३] ⑥

اَوَلَمْ يَرَوْا اِلَى الْاَرْضِ كَمْ اَنْۢبَتْنَا فِيْهَا مِنْ كُلِّ زَوْجٍ كَرِيْمٍ ⑦

काय यांनी जमिनीवर दृष्टी टांकली नाही? की आम्ही तिच्यात हरेक प्रकारच्या उत्तम जोड्या, कशाप्रकारे उगविल्या आहेत?[४] ⑦

اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيَةً ؕ وَمَا كَانَ اَكْثَرُهُمْ مُّؤْمِنِيْنَ ⑧

नि:संशय याच्यांत (मोठीच) निशाणी आहे;[५] आणि यांच्यातील बहुतेक लोक, ईमानवाले नाहीत[६] ⑧

وَاِنَّ رَبَّكَ لَهُوَ الْعَزِيْزُ الرَّحِيْمُ ⑨

आणि आपला पालनकर्ता, खचित्च, तोच, सामर्थ्यवान आणि दयाळू आहे[७] ⑨

१) नबी ﷺ ला, माणुसकीबिरोबर जी सहानभूती होती, त्यांना हिदायत मिळावी म्हणून जी कळकळ होती, त्यांचे याच्यात प्रदर्शन आहे.

२) म्हणजे ज्याला मानल्याशिवाय, आणि ज्यावर ईमान आणल्याशिवाय, गत्यंतर नव्हते. परंतु अशाप्रकारे सक्ती झाली असती; जेव्हा की आम्ही माणसाला इराद्दा आणि अंगिकार करण्याचे ( वा न करण्याचे ) स्वातंत्र्य दिले आहे की, त्याची परीक्षा घेतली जावी. म्हणून आम्ही अशी निशाणी पण उतारण्याचे टाळले, ज्यामुळे आमच्या या कायद्यावर परिणाम व्हावा. आणि फक्त पैगंबर पाठविले आणि पुस्तके प्रकट करण्यावरच समाधान मानले.

३) म्हणजे खोटे ठरविण्याच्या परिणामांत, आमची शिक्षा, लवकरच त्यांना आपल्या पकडीत घेऊन घेणार. ज्याला ते अशक्य समजून त्याची टर आणि हंशी उडवित आहेत. ही शिक्षा जगात पण शक्य आहे, जसे की कित्येक समाज नष्ट होऊन गेलेत. दुसऱ्या स्वरूपांत, परलोकांत तर, याच्यापासून कुठल्याही प्रकारे सुटका होणार नाही.

४) 'जौज' चा दुसरा अर्थ येथे, 'अनेक प्रकारचे' असा केला गेला आहे. म्हणजे प्रत्येक प्रकारच्या वस्तू आम्ही निर्माण केल्या, ज्या करीम आहेत. म्हणजे माणसासाठी फायदेदायक किंवा भरपूर ज्याप्रमाणे धान्याची जाती आहे, फळफळावळ आहेत. आणि जनावरे वगैरे आहेत.

५) म्हणजे जेव्हा अल्लाहतआला मृत जमिनीमधून, या वस्तू निर्माण करू शकतो, तर काय तो माणसांना, दुसऱ्यांदा निर्माण करू शकत नाही.

६) म्हणजे हे त्याचे विराट सामर्थ्य पाहून सुद्धा, बहुतेक लोक अल्लाह आणि पैगंबराला खोटेच म्हणतात; ईमान आणित नाहीत.

७) म्हणजे प्रत्येक वस्तुंवर त्याचे प्राबल्य, आणि बदला घेण्याकरीता तो हर प्रकारे समर्थ आहे; परंतु, का की, तो दयाळू पण आहे, म्हणून लगेच पकड करीत नाही. किंबहुना पूर्ण सवलत देतो; आणि त्याच्या नंतरच पकड करतो.

وَ اِذۡ نَادٰی رَبُّكَ مُوۡسٰۤی اَنِ ائۡتِ الۡقَوۡمَ الظّٰلِمِیۡنَ ۙ﴿۱۰﴾

**आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने मूसा (अ.) ला सांगितले की, तू गुन्हेगार लोकांकडे जा!**[१] ⑩

قَوۡمَ فِرۡعَوۡنَ ؕ اَلَا یَتَّقُوۡنَ ﴿۱۱﴾

**फिरऔनच्या लोकांजवळ, काय हे लोक आम्हास भित नाहीत ?** ⑪

قَالَ رَبِّ اِنِّیۡۤ اَخَافُ اَنۡ یُّكَذِّبُوۡنِ ﴿ؕ۱۲﴾

**मूसा (अ.) ने म्हटले, हे माझ्या पालनकर्त्या! मला भीती वाटते की, कोठे ते मला खोटे म्हणतील** ⑫

وَ یَضِیۡقُ صَدۡرِیۡ وَ لَا یَنۡطَلِقُ لِسَانِیۡ فَاَرۡسِلۡ اِلٰی هٰرُوۡنَ ﴿۱۳﴾

**आणि माझी छाती संकोचित् होत आहे,**[२] **आणि माझी जिव्हा चालत नाही;**[३] **तर तू हारूनकडे पण (वह्य) पाठव**[४] ⑬

وَ لَهُمۡ عَلَیَّ ذَنۡۢبٌ فَاَخَافُ اَنۡ یَّقۡتُلُوۡنِ ﴿ۚ۱۴﴾

**आणि त्यांचा माझ्यावर एक चुकीचा (दावा) पण आहे. मला भीती वाटते की, कोठे त्यांनी मला मारुन न टाकावे**[५] ⑭

قَالَ كَلَّا ۚ فَاذۡهَبَا بِاٰیٰتِنَاۤ اِنَّا مَعَكُمۡ مُّسۡتَمِعُوۡنَ ﴿۱۵﴾

**अल्लाहने फर्माविले, असे मुळीच होणार नाही. तुम्ही दोघे आमच्या निशाण्या घेऊन जा;**[६] **आम्ही स्वत: ऐकणारे तुमच्या बरोबर आहोत.**[७] ⑮

فَاۡتِیَا فِرۡعَوۡنَ فَقُوۡلَاۤ اِنَّا رَسُوۡلُ رَبِّ الۡعٰلَمِیۡنَ ﴿ۙ۱۶﴾

**तुम्ही दोघे फिरऔनाकडे जाऊन (त्याला) सांगा, खचित्च आम्ही सकल जगाच्या पालनकर्त्याकडून, पाठविलेले आहोत.** ⑯

اَنۡ اَرۡسِلۡ مَعَنَا بَنِیۡۤ اِسۡرَآءِیۡلَ ﴿ؕ۱۷﴾

**की तू आमच्या बरोबर बनी इस्राईल ला रवाना करून दे**[८] ⑰

१) हे अल्लाहचे या वेळेचे पुकारणे आहे, जेव्हा ह.मूसा عليه السلام मदयनहून, आपल्या पत्नीसह, परत येत होते. रस्त्यांत त्यांना ऊब मिळविण्याकरीता, अग्नीची आवश्यकता भासली. तर अग्नीच्या शोधात, तूर पर्वतावर पोहचून गेले. जेथे अदृष्ट आवाजाने त्यांचे स्वागत केले; आणि त्यांना पैगंबरीने विभूषित केले गेले; आणि जालीमांना अल्लाहचा संदेश, पोहचविण्याचे कर्तव्य, त्यांना सोपवण्यात आले.

२) या भीतीने की, तो फारच शिरजोर आहे, मला खोटे ठरवेल, याच्याने ठाऊक झाले की, स्वाभाविक भीती, पैगंबरांना सुद्धा वाटू शकते.

३) हा इशारा आहे त्या गोष्टीकडे, की ह.मूसा عليه السلام जास्त चांगले वक्ते नव्हते. किंवा याकडे की, जिभेवर विस्तव ठेवल्यामुळे, अडखळणे निर्माण होऊन गेले होते; ज्यामुळे भाष्यकार वर्णन करतात.

४) म्हणजे त्यांच्याकडे जिब्रईल عليه السلام ला. वह्य घेऊन पाठव. आणि त्यांना पण वह्य आणि पैगंबरीने विभूषित करून, माझा मददगार बनीव.

५) हा इशारा आहे त्या खुनाकडे, जो मूसा عليه السلام कडून नकळत होऊन गेला होता; आणि ठार झालेला किब्ती, म्हणजे फिरऔनाच्या लोकांपैकी, होता. म्हणून फिरऔन त्याच्या बदल्यांत, ह.मूसा عليه السلام ला ठार करू इच्छित होता; ज्याची सूचना भेटून ह.मूसा عليه السلام इजिप्त हून, मदयनला चालले गेले होते. त्या घटनेला जरी, कित्येक वर्षे उलटून गेली होती, तरी फिरऔनाजवळ जाण्यात, खरोखरी ही शक्यता होती की, फिरऔन, त्यांना या अपराधाबद्दल पकडून, खुनाची शिक्षा देण्याचा प्रयत्न करेल. म्हणून ही भीती सुद्धा निरर्थक नव्हती.

६) अल्लाहतआलाने सांत्वन केले की, तुम्ही दोघे जा. माझा संदेश त्याला पोहचवा. तुम्हाला जी भीती वाटते, त्यापासून आम्ही तुमचे संरक्षण करू. महावाक्याने अभिप्रेत ती प्रमाणे आणि निशाण्या आहेत; ज्यांनी प्रत्येक पैगंबराला सूचित केले जाते किंवा ते चमत्कार आहेत, जे ह.मूसा عليه السلام ला देण्यांत आले होते. जसे प्रकाशमान हात आणि लाठी.

७) म्हणजे तुम्ही जे काही म्हणाल, आणि त्याच्या उत्तरांत तो जे काही म्हणेल, (ते) आम्ही ऐकत राहूं. यासाठी घाबरण्याची काही जरूरी नाही. आम्ही तुम्हांस पैगंबरीचे कर्तव्य सोपून, तुमच्या संरक्षणाकडून बेपर्वा होऊन जाणार नाहीत. किंबहुना, आमची मदत तुमच्याबरोबर आहे 'मईय्यत' चा अर्थ नुसते बरोबर रहाणे नाही, किंबहुना सहाय्य आणि मदत करणे आहे.

८) म्हणजे एक गोष्ट ही सांगा की, आम्ही तुझ्याजवळ आपल्या मर्जीने आलो नाहीत; किंबहुना सकल जगांच्या पालनकर्त्याचे प्रतिनिधी आणि त्याचे पैगंबर म्हणून, आलो आहोत. दुसरी गोष्य ही की तुम्ही (चारशे वर्षापासून) बनी इस्राईलला गुलाम बनवून ठेविले आहे, त्यांना स्वातंत्र्य बहाल करून दे; की, मी त्यांना सीरियाच्या भूप्रदेशाकडे घेऊन जावे; जिचा अल्लाहने त्यांच्याशी वायदा केला आहे.

قَالَ اَلَمۡ نُرَبِّكَ فِيۡنَا وَلِيۡدًا وَّلَبِثۡتَ فِيۡنَا مِنۡ عُمُرِكَ سِنِيۡنَ ۙ﴿۱۸﴾

**फिरऔनाने म्हटले की काय, आम्ही तुला, तुझ्या बालपणी, आपल्या येथे पाळले नव्हते? (१) आणि तू आपल्या आयुष्याची बरीच वर्षे, आम्हांत घालविली नव्हतीस? (२) १८**

وَفَعَلۡتَ فَعۡلَتَكَ الَّتِىۡ فَعَلۡتَ وَاَنۡتَ مِنَ الۡكٰفِرِيۡنَ ﴿۱۹﴾

**मग तू आपले एक काम केले होतेस, जे (तूच) केले होते. आणि तू कृतघ्न लोकांपैकी आहेस (३) १९**

قَالَ فَعَلۡتُهَاۤ اِذًا وَّاَنَا مِنَ الضَّآلِّيۡنَ ؕ﴿۲۰﴾

**ह.मूसा عليه السلام ने उत्तर दिले की, मी ते काम त्यावेळी केले होते, जेव्हा की मी मार्ग विसरलेल्या लोकांमधून होतो (४) २०**

فَفَرَرۡتُ مِنۡكُمۡ لَمَّا خِفۡتُكُمۡ فَوَهَبَ لِىۡ رَبِّىۡ حُكۡمًا وَّجَعَلَنِىۡ مِنَ الۡمُرۡسَلِيۡنَ ﴿۲۱﴾

**मग तुमची भीती वाटून, मी तुमच्यातून पळून गेलो. मग मला माझ्या पालनकर्त्याने अधिकार आणि ज्ञान दिले; आणि मला आपल्या पैगंबरामधून करून टाकले (५) २१**

وَتِلۡكَ نِعۡمَةٌ تَمُنُّهَا عَلَىَّ اَنۡ عَبَّدْتَّ بَنِىۡۤ اِسۡرَآءِيۡلَ ؕ﴿۲۲﴾

**आणि माझ्यावर तुझा काय हाच उपकार आहे? ज्याची तू जाणीव करून देत आहे की, तू बनी इस्राईलला गुलाम बनवून ठेवले आहेस (६) २२**

قَالَ فِرۡعَوۡنُ وَمَا رَبُّ الۡعٰلَمِيۡنَ ؕ﴿۲۳﴾

**फिरऔनाने विचारले, सकल जगाचा पालनकर्ता कोण आहे? (७) २३**

قَالَ رَبُّ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ وَمَا بَيۡنَهُمَا ؕ اِنۡ كُنۡتُمۡ مُّوۡقِنِيۡنَ ﴿۲۴﴾

**मूसा عليه السلام ने सांगितले, तो आकाश आणि पृथ्वीचा, आणि यांच्या दर्म्यानच्या प्रत्येक वस्तूंचा पालनकर्ता आहे. जर तुम्ही विश्वास बाळगणारे असाल. २४**

قَالَ لِمَنۡ حَوۡلَهٗۤ اَلَا تَسۡتَمِعُوۡنَ ﴿۲۵﴾

**फिरऔनाने आपल्या आजुबाजूच्या लोकांना म्हटले, काय तुम्ही ऐकून राहिला नाहीत? (८) २५**

قَالَ رَبُّكُمۡ وَرَبُّ اٰبَآئِكُمُ الۡاَوَّلِيۡنَ ﴿۲۶﴾

**मूसा عليه السلام ने म्हटले, तो तुमचा आणि तुमच्या पूर्वीच्या वाडवडीलांचा पालनकर्ता आहे. २६**

قَالَ اِنَّ رَسُوۡلَكُمُ الَّذِىۡۤ اُرۡسِلَ اِلَيۡكُمۡ لَمَجۡنُوۡنٌ ﴿۲۷﴾

**फिरऔनाने म्हटले, (लोकांनो!) तुमचा हा पैगंबर, जो तुमच्याकडे पाठविण्यांत आला आहे, तो तर खचित्‌च वेडा आहे. २७**

१) फिरऔनने ह.मूसा عليه السلام च्या आवाहन आणि मागणीवर, चिंतन, करण्याऐवजी, त्यांना क्षुल्लक लेखणे आणि कमी लेखणे, सुरू करून दिले; आणि म्हटले, काय तू तोच नाहीस, जो आमच्या कुशीत आणि घरांत वाढलास ! जेव्हांकी, आम्ही बनी इस्राईलच्या मुलांस ठार मारीत असू.

२) काही म्हणतात की, १८ वर्षे फिरऔनाच्या महालांत राहिले; काही जवळ ३०, आणि काहींजवळ ४० वर्षे. म्हणजे इतके वय, आमच्याजवळ घालवल्यानंतर, थोडी वर्षे इकडे तिकडे राहून, आता तू पैगंबरीचा दावा करू लागला आहेस?

३) मग आमचेच खाऊन, आमच्याच लोकांपैकी, एकाचा खून करून, आम्हाशी कृतघ्नपणा पण केलास.

४) म्हणजे हा खून विचारपूर्वक नव्हता; किंबहुना एक बुक्काच होता, जो त्याला मारण्यांत आला होता, ज्यामुळे त्याचा मृत्युच घडून आला. याशिवाय, ही घटना पण, पैगंबरीपूर्वीची आहे. जेव्हा की, मला ज्ञानाचा हा प्रकाश दिला गेला नव्हता.

५) म्हणजे पूर्वी जे काही झाले, ते आपल्या ठिकाणी, परंतु आता मी अल्लाहचा पैगंबर आहे. जर माझे आज्ञापालन करशील, तर वांचून जाशील ! नाहीतर नष्ट होणे, हे तुझ्या दैवी आहे.

६) म्हणजे हा चांगला उपकार आहे, जो तू मला दर्शवित आहेस; की मला तर तू खचित्‌च गुलाम बनविले नाहीस, आणि स्वातंत्र करून ठेवले, परंतु माझ्या सर्व समाजाला गुलाम करून ठेविले आहेस ! या मोठ्या जुलुमाच्या तुलनेत, या उपकाराची किंमत तरी काय ?

७) हे त्याने विचारपूस म्हणून नाही, तर अहंमन्यता आणि अहंकार म्हणून, म्हटले, कारण की त्याचा दावा तर हा होता की, ''मी,आपल्या शिवाय, तुमच्या करितां, आणखी कोणी उपास्य जाणतच नाही'' (सू.कसस-३८)

८) म्हणजे काय तुम्ही, याच्या गोष्टीवर आश्चर्य करीत नाही? की, माझ्या शिवायपण, आणखी कोणी उपास्य आहे?

قَالَ رَبُّ الْمَشْرِقِ وَالْمَغْرِبِ وَمَا بَيْنَهُمَا ۖ إِنْ كُنْتُمْ تَعْقِلُونَ ﴿٢٨﴾

**ह.मूसाने म्हटले तोच, पूर्व आणि पश्चिमेचा, आणि त्यांच्या दर्म्यानच्या तमाम वस्तुंचा पालनकर्ता[१] आहे, जर तुम्ही अक्कल बाळगीत असाल (२८)**

قَالَ لَئِنِ اتَّخَذْتَ إِلَٰهًا غَيْرِي لَأَجْعَلَنَّكَ مِنَ الْمَسْجُونِينَ ﴿٢٩﴾

**फिरऔन म्हणू लागला, ऐकून घे!, जर तू माझ्याशिवाय, अन्य कोणास उपास्य बनविले तर मी तुला कैद्यांमध्ये टाकून देईन;[२] (२९)**

قَالَ أَوَلَوْ جِئْتُكَ بِشَيْءٍ مُبِينٍ ﴿٣٠﴾

**मूसा ﷵ ने म्हटले, जरी मी तुझे जवळ उघड उघड चमत्कार घेऊन येऊ?[३] (३०)**

قَالَ فَأْتِ بِهِ إِنْ كُنْتَ مِنَ الصَّادِقِينَ ﴿٣١﴾

**फिरऔन म्हणाला, जर तू खऱ्यापैकी आहेस, तर तो आण पाहू! (३१)**

فَأَلْقَىٰ عَصَاهُ فَإِذَا هِيَ ثُعْبَانٌ مُبِينٌ ﴿٣٢﴾

**त्यांनी त्याचवेळी आपली काठी टाकून दिली; जी अचानक उघड उघड, एक (भयंकर) अजगर बनून गेली[४] (३२)**

وَنَزَعَ يَدَهُ فَإِذَا هِيَ بَيْضَاءُ لِلنَّاظِرِينَ ﴿٣٣﴾

**आणि आपला हात ओढून काढला, तर तो पण त्याच वेळी प्रत्येक पाहणाऱ्याला, शुभ्र चमकणारा दिसू लागला[५] (३३)**

قَالَ لِلْمَلَإِ حَوْلَهُ إِنَّ هَٰذَا لَسَاحِرٌ عَلِيمٌ ﴿٣٤﴾

**फिरऔन आपल्या जवळपासच्या सरदारांना म्हणू लागला, की हा तर कोणी मोठा शहाणा जादूगीर आहे.[६] (३४)**

يُرِيدُ أَنْ يُخْرِجَكُمْ مِنْ أَرْضِكُمْ بِسِحْرِهِ فَمَاذَا تَأْمُرُونَ ﴿٣٥﴾

**हा तर इच्छितो की, आपल्या जादूच्या जोरावर, तुम्हांस तुमच्या शहरांतूनच काढून टाकावे. सांगा! आता तुम्ही काय सल्ला देता?[७] (३५)**

قَالُوا أَرْجِهْ وَأَخَاهُ وَابْعَثْ فِي الْمَدَائِنِ حَاشِرِينَ ﴿٣٦﴾

**त्यांनी सांगितले की, आपण त्याला आणि त्याच्या भावाला असेच सोडून द्या, आणि सर्व शहरांत, गोळा करणारे, पाठवून द्या; (३६)**

१) म्हणजे ज्याने पूर्वेला पूर्व बनविले, जेथून तारे उगवितात; आणि पश्चिमेला पश्चिम बनविले, ज्यांत तारे मावळतात. अशाच प्रकारे, यांच्या दर्म्यान, जे काही आहे, त्या सर्वांचा पालनकर्ता आणि त्यांची व्यवस्था पण करणारा तोच आहे.

२) फिरऔनाने जेव्हा पाहिले की, मूसा ﷵ वेगवेगळ्या प्रकारे, सकल जगाच्या पालनकर्त्याचे संपूर्ण पालकत्त्वाचे, स्पष्टीकरण करीत आहे, ज्याचे काही योग्य उत्तर, त्याला सांपडत नाही, तर त्याने प्रमाणांना दृष्टीआड करून, धमकी देणे सुरु केले. आणि मूसा ﷵ ला कैदेत टाकण्याची भीती दाखविली.

३) म्हणजे अशी कोणी वस्तू, किंवा चमत्कार, ज्याने स्पष्ट होऊन जाईल की, मी खरा, आणि खरोखर अल्लाहचा पैगंबर आहे, तरी सुद्धा तू माझ्या खरेपणाला मान्य करणार नाहीस?

४) काही ठिकाणी 'सुअबान' ला, 'हय्यतून', आणि काही ठिकाणी, 'जानून' म्हणण्यात आले आहे. 'सुअबान' तो सर्प असतो, जो मोठा असेल, आणि 'जानून' लहान सापाला म्हणतात; आणि 'हय्यतून', लहान मोठ्या, दोन्ही प्रकारच्या सापांना म्हणण्यात येते. (फत्हुल कदीर) जणू हा चमत्कार दाखवितांना, लाठीने प्रथम छोट्या सापाचे स्वरूप धारण केले, मग पहाता पहाता अजगर बनून गेली. वल्लाहु अअ्लम!

५) म्हणजे गळपट्टीतून हाथ काढला, तर तो चंद्राच्या तुकड्याप्रमाणे चमकत होता. हा दुसरा चमत्कार मूसा ﷵ नी सादर केला.

६) फिरऔन शिवाय याच्या की, या चमत्कारापासून, ह.मूसा ﷵ ला (पैगंबर म्हणून) मान्य करता, आणि ईमान आणता, त्याने नाकारणे, आणि अहंकाराचा मार्ग अनुसरला. आणि ह.मूसा ﷵ च्या बाबतीत सांगितले की हा तर मोठा ज्ञानी जादूगीर आहे.

७) मग आपल्या लोकांना आणखी भडकविण्यासाठी, सांगितले की तो, या हातचलाखीमार्फत, तुम्हांस येथून काढून, स्वत: या (भूमी) वर कबजा करू इच्छितो. आता सांगा! तुमचा काय सल्ला आहे ? म्हणजे याच्या बरोबर काय व्यवहार केला जावा?

| | |
|---|---|
| जे आपल्याजवळ, उच्च ज्ञानी जादूगीर, घेऊन येतील[१] ३७ | يَأْتُوكَ بِكُلِّ سَحَّارٍ عَلِيمٍ ﴿٣٧﴾ |
| मग एका निश्चित केलेल्या दिवसाच्या वायद्यावर, सर्व जादूगीर गोळा केले गेले.[२] ३८ | فَجُمِعَ السَّحَرَةُ لِمِيقَاتِ يَوْمٍ مَّعْلُومٍ ﴿٣٨﴾ |
| आणि सर्व लोकांना पण सांगून देण्यात आले की, तुम्ही पण जमावात हाजीर होऊन जाणार[३] ३९ | وَّقِيلَ لِلنَّاسِ هَلْ أَنتُم مُّجْتَمِعُونَ ﴿٣٩﴾ |
| कारण की, जर जादूगीर प्रबळ राहिले, तर आम्ही त्यांचेच अनुकरण करू ४० | لَعَلَّنَا نَتَّبِعُ السَّحَرَةَ إِن كَانُوا هُمُ الْغَالِبِينَ ﴿٤٠﴾ |
| जादूगीर येऊन फिरऔनाला म्हणू लागले, की जर आम्ही जिंकलो, तर आम्हांस काही बक्षीस पण मिळेल ? ४१ | فَلَمَّا جَاءَ السَّحَرَةُ قَالُوا لِفِرْعَوْنَ أَئِنَّ لَنَا لَأَجْرًا إِن كُنَّا نَحْنُ الْغَالِبِينَ ﴿٤١﴾ |
| फिरऔनाने सांगितले, (मोठ्या आनंदाने) किंबहुना अशा स्वरूपांत, तुम्ही माझे खास दरबारी बनून जाल. ४२ | قَالَ نَعَمْ وَإِنَّكُمْ إِذًا لَّمِنَ الْمُقَرَّبِينَ ﴿٤٢﴾ |
| ह.मूसा عليه السلام नी जादुगीरांना म्हटले, जे काही तुम्हास टाकावयाचे आहे, टाकून द्या[४] ४३ | قَالَ لَهُم مُّوسَىٰ أَلْقُوا مَا أَنتُم مُّلْقُونَ ﴿٤٣﴾ |
| त्यांनी आपल्या दोऱ्या आणि काठ्या टांकून दिल्या; आणि म्हणू लागले, फिरऔनाच्या प्रतिष्ठेची शपथ! आम्ही खचित्च खचित्च प्रबळ राहू[५] ४४ | فَأَلْقَوْا حِبَالَهُمْ وَعِصِيَّهُمْ وَقَالُوا بِعِزَّةِ فِرْعَوْنَ إِنَّا لَنَحْنُ الْغَالِبُونَ ﴿٤٤﴾ |

१) म्हणजे या दोघांना सद्य स्थितीत, याच स्थितीत सोडून द्या. आणि सर्व शहरातून जादुगीरांना जमा करून, यांच्याशी आपसांत सामना केला जावा; की, त्यांच्या हातचलाखीचे उत्तर, आणि तुझे समर्थन, आणि सहाय्य केले जावे. आणि ही अल्लाहकडूनच नियोजित व्यवस्था होती की, लोकांनी एकाच जागी गोळा होऊन जावे; आणि मूसा عليه السلام ची प्रमाणे आणि चमत्कारांना, आपल्याच डोळ्यांनी पाहून घ्यावे. जे अल्लाहतआलाने मूसा عليه السلام ला प्रदान केले होते.

२) म्हणून, जादुगीरांची एक फार मोठी संख्या, इजिप्तच्या आजुबाजूने, आणि इजिप्तमधून सुद्धां, गोळा करण्यात आली. यांची संख्या, १२ हजार, १७ हजार, १९ हजार, ३० हजार आणि ८० हजार (निरनिराळ्या लोकांच्या म्हणण्यानुसार) सांगण्यात येते. खरी संख्या अल्लाहच चांगल्या प्रकारे जाणतो. कारण की कोण्या ठोस गोष्टींत, संख्येचा उल्लेख नाही. याचे खुलाशे आणि तपशील, याच्यापूर्वी सू.आअराफ, सू.ताहामध्ये सुद्धा येऊन चुकला आहे. जणू फिरऔनाचा समाज किब्त्यांनी तर, अल्लाहच्या प्रकाशाला आपल्या तोंडांनी, विझवू इच्छिला होता; परंतु अल्लाहतआला आपल्या प्रकाशाला पूर्ण करू इच्छित होता. म्हणून कुफ्र आणि ईमानच्या संघर्षात, नेहमी असेच होत आले आहे की, जेव्हा पण कुफ्र दंड ठोकून, ईमानाच्या मुकाबल्यात येते, तेव्हा अल्लाहतआला ईमानाला, विजय आणि प्राबल्य प्रदान करतो. ज्याप्रमाणे फर्माविले ''किंबहुना आम्ही सत्त्याला असत्त्यावर फेंकून मारतो. मग ते त्याचे डोके ठेंचून टाकते. आणि असत्य त्याचवेळी नाहीसे होऊन जाते.'' (सू.अंबिया-१८)

३) म्हणजे जनतेला पण ताकीद केली जात आहे की, तुम्हांस पण हा संघर्ष पहाण्यासाठी, अवश्यक हजर होणे आहे.

४) ह.मूसा عليه السلام कडून, जादुगिरांना प्रथम आपले कर्तृत्व दाखविण्याबद्दल सांगणे, यांत हे प्रयोजन वाटते की, एक तर त्यांच्यावर हे स्पष्ट होऊन जावे की, अल्लाहचा पैगंबर, इतक्या मोठ्या संख्येत नामांकीत जादुगीरांचा जमाव, आणि त्यांच्या जादुच्या कर्तृत्वाने भयभित नाही. दुसरा हा उद्देश्य पण असूंशकतो की, नंतर मग अल्लाहच्या हुकुमाने, या सर्व हातचलाख्या, एका क्षणांत नाहीशा होऊन जातील. तर पहाणाऱ्यांवर याचे चांगले परिणाम होतील. आणि अशाप्रकारे कदाचित् जास्त लोक अल्लाहवर ईमान घेऊन येतील. तात्पर्य, झालेही असेच. किंबहुना जादुगीरच सर्वांत प्रथम ईमान घेऊन आले. जसे की, पुढे येत आहे.

५) जसे की सू.आअराफ आणि ताहा मध्ये, येऊन चुकले की, त्या जादूगिरांनी आपल्या विचारांत फार मोठा जादू सादर केला. (सू.आअ्राफ-११६) येथ पावेतो की, ह.मूसा عليه السلام ला, पण आपल्या मनांत भीती वाटली. (सू.ताहा-६७) तात्पर्य, या जादुगीरांना आपले यश आणि वर्चस्वाची मोठी खात्री होती, जसे की येथे या शब्दांनी उघड आहे. परंतु अल्लाहतआलाने ह.मूसा عليه السلام चे सांत्वन केले की, घाबरण्याची आवश्यकता नाही, जरा आपली काठी जमिनीवर टाका, आणि मग पहा! तात्पर्य, काठीचे जमिनीवर टाकणे होते की, तिने एका भयानक अजगराचे रुप धारण करून घेतले. आणि एक एक करून त्याने त्यांच्या कर्तृत्वाला गिळकृत करून टाकले. जसे की पुढील महावाक्यांत आहे.

فَاَلْقٰى مُوْسٰى عَصَاهُ فَاِذَا هِیَ تَلْقَفُ مَا یَاْفِكُوْنَ ۝۴۵

आता मूसा (अ.) नी सुद्धा आपली काठी मैदानांत टाकून दिली, जिने त्याच वेळी, त्यांच्या बनविलेल्या खेळण्यांना गिळणे सुरू करून दिले ۝۴۵

فَاُلْقِیَ السَّحَرَةُ سٰجِدِیْنَ ۝۴۶

हे पहाताच जादूगीर सजद्यांत पडून गेले; ۝۴۶

قَالُوْۤا اٰمَنَّا بِرَبِّ الْعٰلَمِیْنَ ۝۴۷

आणि त्यांनी स्पष्ट सांगून टाकले की, आम्ही तर अल्लाह, सकल जगाच्या पालनकर्त्यावर ईमान आणले. ۝۴۷

رَبِّ مُوْسٰى وَ هٰرُوْنَ ۝۴۸

म्हणजे मूसा आणि हारूनच्या पालनकर्त्यावर ۝۴۸

قَالَ اٰمَنْتُمْ لَهٗ قَبْلَ اَنْ اٰذَنَ لَكُمْ ۚ اِنَّهٗ لَكَبِیْرُكُمُ الَّذِیْ عَلَّمَكُمُ السِّحْرَ ۚ فَلَسَوْفَ تَعْلَمُوْنَ ۬ؕ لَاُقَطِّعَنَّ اَیْدِیَكُمْ وَ اَرْجُلَكُمْ مِّنْ خِلَافٍ وَّ لَاُوصَلِّبَنَّكُمْ اَجْمَعِیْنَ ۝۴۹

फिरऔनाने म्हटले की, माझ्या परवानगीच्या पहिले (च) तुम्ही याच्यावर ईमान घेऊन आलांत ? खचित्‌च हा तुमचा मोठा (सरदार) आहे, ज्याने तुम्हा सर्वांस जादू शिकविला आहे; [१] तर आता तुम्हास लवकरच ठाऊक होऊन जाईन. शपथ आहे, मी सुद्धा तुमचे हातपाय उलट सुलट कांपून टाकेन, आणि तुम्हा सर्वांस, फासावर लटकवून देईन[२] ۝۴۹

قَالُوْا لَا ضَیْرَ ۫ اِنَّاۤ اِلٰى رَبِّنَا مُنْقَلِبُوْنَ ۝۵۰

त्यांनी सांगितले, काही हरकत नाही, [३] आम्ही तर आपल्या पालनकर्त्याकडे परतूनच जाणार आहोत ۝۵۰

اِنَّا نَطْمَعُ اَنْ یَّغْفِرَ لَنَا رَبُّنَا خَطٰیٰنَاۤ اَنْ كُنَّاۤ اَوَّلَ الْمُؤْمِنِیْنَ ۝۵۱ ع ۳ / ۴۸ / ۷

या कारणाने की, आम्ही सर्वांत प्रथम ईमानवाले बनलो आहोत. [४] आम्हाला आशा आहे की, आमचा पालनकर्ता आमचे सर्व अपराध क्षमा करून टाकेन ۝۵۱

وَ اَوْحَیْنَاۤ اِلٰى مُوْسٰۤى اَنْ اَسْرِ بِعِبَادِیْۤ اِنَّكُمْ مُّتَّبَعُوْنَ ۝۵۲

आणि आम्ही मूसाला वह्य केले की, रात्रीतून माझ्या सेवकांना काढून, घेऊन चल. तुम्हा सर्वांचा पाठलाग केला जाईल. [५] ۝۵۲

१) फिरऔन करीता ही घटना मोठी विचित्र आणि आश्चर्यजनक होती की, ज्या जादुगीरांमार्फत, तो विजय आणि वर्चस्वाची आस बाळगून होता, ते न फक्त पराजित होऊन गेले, किंबहुना याच प्रसंगी ते (आपल्या) पालनकर्त्यावर ईमान घेऊन आले. ज्याने ह.मूसा عليه السلام आणि ह.हारून عليه السلام ला, प्रमाणे आणि चमत्कार घेऊन पाठविले होते. परंतु फिरऔनाने याच्यावर चिंतन व मनन केल्यानंतर, काम घेतले असते; याशिवाय, त्याने अहंकार आणि मोठेपणाचा मार्ग अनुसरला. आणि जादुगीरांना भिवविणे आणि धमक्या देणे सुरू करून दिले. आणि सांगितले की तुम्ही सर्व त्याचेच शिष्य वाटतात; आणि तुमचा उद्देश्य असा वाटतो की, या कारस्थानाने, तुम्ही आम्हांस येथून काढून लावावे. ''इन्न हाजा लमकरून मकरतुमुहु फिल् मदिनती लितुखरिजु मिन्हा अहलहा.'' (सू.आअ्‌राफ-१२३)

२) उलट्या पद्धतीने हात पाय का पण्याचा अर्थ, उजवा हात आणि डांवा पाय, किंवा उजवा पाय आणि डांवा हात आहे. याच्यानंतर मग फांशी देणे. म्हणजे त्याच्या प्रकोपाची आग, हात पाय कापल्यानंतर सुद्धां, थंड झाली नाही म्हणून आणखी त्याने फांसावर लटकविण्याची घोषणा केली.

३) 'ला जय्‌र' काही हरकत नाही. किंवा आम्हांस काही पर्वा नाही. म्हणजे आता जी शिक्षा इच्छशील, ती देऊन घे. ईमानापासून आम्ही फिरू शकत नाही.

४) प्रथम ईमानवाले या अनुषंगाने म्हटले की, फिरऔनाचे लोक, मुसलमान झाले नाहीत. आणि हे ईमान कबूल करण्यांत अग्रेसर राहिलेत.

५) जेव्हा इजिप्तच्या शहरांत, ह.मूसा عليه السلام चे थांबणे लांबून गेले; आणि सर्व प्रकारे त्यांनी फिरऔन आणि त्याच्या दरबारी मंडळींशी, तर्क पूर्ण करून टाकला, यावर सुद्धा ते ईमान आणण्यांस तयार झाले नाहीत; तेव्हांआतां, याशिवाय काही उपाय राहिला नाही की, त्यांना शिक्षेत ग्रस्त करून,इतरांसाठी धडा घेण्यासाठी नमुना बनवून देण्यांत यावा. तात्पर्य, अल्लाहतआलाने, ह.मूसा عليه السلام ला हुकूम दिला की, रातोरात बनी इस्राईल ला घेऊन, निघून जावे. आणि सांगितले की, फिरऔन तुमच्या मागे येईल, घांबरू नये.

فَاَرۡسَلَ فِرۡعَوۡنُ فِى الۡمَدَآٮِٕنِ حٰشِرِيۡنَ‌ۚ‏ ﴿۵۳﴾
**फिरऔनाने शहरामध्ये लोकांना गोळा करण्यासाठी हरकारे पाठवून दिले.** ﴾५३﴿

اِنَّ هٰٓؤُلَاۤءِ لَشِرۡذِمَةٌ قَلِيۡلُوۡنَۙ‏ ﴿۵۴﴾
**की, खचित्‌च हा समूह, फारच अल्पसंख्य आहे[१]** ﴾५४﴿

وَاِنَّهُمۡ لَنَا لَغَآٮِٕظُوۡنَۙ‏ ﴿۵۵﴾
**आणि त्यांनी आम्हाला फारच क्रोधीत केले आहे.[२]** ﴾५५﴿

وَاِنَّا لَجَمِيۡعٌ حٰذِرُوۡنَؕ‏ ﴿۵۶﴾
**आणि खचित्‌च आम्ही एक मोठा समूह आहोत. त्यांच्यापासून सावध राहणारे[३]** ﴾५६﴿

فَاَخۡرَجۡنٰهُمۡ مِّنۡ جَنّٰتٍ وَّعُيُوۡنٍۙ‏ ﴿۵۷﴾
**तात्पर्य आम्ही त्यांस, बागांतून आणि झऱ्यांतून,** ﴾५७﴿

وَّكُنُوۡزٍ وَّمَقَامٍ كَرِيۡمٍۙ‏ ﴿۵۸﴾
**आणि खजिन्यांतून आणि मान सन्मानाच्या जागांतून, काढून बाहेर केले.[४]** ﴾५८﴿

كَذٰلِكَ ؕ وَاَوۡرَثۡنٰهَا بَنِىۡۤ اِسۡرَآءِيۡلَ ؕ‏ ﴿۵۹﴾
**अशा प्रकारे झाले; आणि आम्ही त्या तमाम वस्तुचे वारस, बनी इस्राईलला बनवून टाकले[५]** ﴾५९﴿

فَاَتۡبَعُوۡهُمۡ مُّشۡرِقِيۡنَ‏ ﴿۶۰﴾
**मग फिरऔनाचे लोक, सूर्य निघतांच, त्यांच्या पाठलागावर निघाले.[६]** ﴾६०﴿

فَلَمَّا تَرَآءَ الۡجَمۡعٰنِ قَالَ اَصۡحٰبُ مُوۡسٰٓى اِنَّا لَمُدۡرَكُوۡنَ‌ۚ‏ ﴿۶۱﴾
**मग जेव्हा दोघांनी एक दुसऱ्याला पाहून घेतले; तेव्हा मूसाच्या साथीदारांनी म्हटले, आम्ही तर खचित्‌च पकडले गेलो[७]** ﴾६१﴿

१) हे उपहास म्हणून म्हटले, नाही तर त्यांची संख्या सहा लाख सांगण्यात येते.

२) म्हणजे माझ्या परवानगीशिवाय, त्यांचे येथून पळून जाणे, आमच्यासाठी प्रकोपाला कारणीभूत आहे.

३) म्हणून यांच्या या कारस्थानाला, अयशस्वी करण्याकरीता, आम्हास तयार होण्याची आवश्यकता आहे.

४) म्हणजे फिरऔन आणि त्याचे सैन्य, बनी इस्राईलच्या मागे काय निघाले? की पुन्हा पलटून, आपली घरे आणि बागांमध्ये येणे, त्यांच्या नशीबीच नव्हते. अशा प्रकारे अल्लाहतआलाने, आपल्या युक्ती आणि इच्छेने, त्यांना सर्व देणग्यांपासून वंचित् करून, त्यांचे वारस दुसऱ्यांना बनवून दिले.

५) म्हणजे जी सत्ता आणि राज्य फिरऔनला मिळाले होते, ते त्यापासून हिसकावून, बनी इस्राईलला प्रदान केले. काही म्हणतात की याच्याने अभिप्रेत, इजिप्तची सत्ता, आणि ऐहिक वैभव व शान, आम्ही बनी इस्राईलला पण दिले. कारण की, बनी इस्राईल, इजिप्तहून निघून गेल्यानंतर, इजिप्तला परत आले नाहीत. तसेच, सू.दुखानमध्ये सांगण्यात आले आहे, ''आम्ही याचा वारस, कोण्या दुसऱ्या लोकांना बनविले.'' (अयसरूत तफासीर) पहिले उल्लेखलेल्यांत, ज्ञान बाळगणारे असे म्हणतात की, ''कौमन् आखरीन्'' मध्ये कौम चा शब्द जरी सर्वसाधारण आहे, परंतु येथे सू.शूअरा मध्ये जेव्हा बनी इस्राईलला वारस बनविण्याचा खुलासा येऊन गेला आहे; तर याच्याने अभिप्रेत पण बनी इस्राईलचे लोकच होतील. परंतु स्वतः कुरआनाच्या खुलाशाप्रमाणे, इजिप्तहून निघाल्यानंतर, बनू इस्राईलला पवित्र भूमीत दाखल होण्याचा हुकूम दिला गेला. आणि त्यांच्या नाकारण्यावर, चाळीस वर्षे पर्यंत हा प्रवेश उशीरा करून, तियाच्या मैदानात भटकविण्यात आले. मग ते पवित्र भूमीत दाखल झाले. तात्पर्य, ह.मूसा عليه السلام ची कबर, हदीसे इस्राअ् प्रमाणे, बैतुल मुकद्दसच्या जवळच आहे. म्हणून खरा अर्थ हाच आहे की, जशा देणग्या, फिरऔनच्या लोकांना इजिप्तमध्ये, मिळाल्या होत्या, तशाच देणग्या आता, बनू इस्राईलला देण्यांत आल्या. परंतु इजिप्तमध्ये नाही, किंबहुना पॅलेस्टाईनमध्ये.

६) म्हणजे जेव्हा सकाळ झाली, आणि फिरऔनाला ठाऊक झाले की, बनी इस्राईल रातोरात, येथून निघून गेले आहेत, तर त्याच्या सत्तेच्या अहंकाराला मोठी (च) ठेंच लागली. आणि सूर्य निघतांच त्यांच्या पाठलागावर निघून पडला.

७) म्हणजे फिरऔनाच्या सैन्याला पाहून, ते घाबरून गेले की, पुढे समुद्र आहे, आणि मागे फिरऔनाचे सैन्य. आता बचाव करणे कसे शक्य आहे? आता पुन्हा तोच फिरऔन आणि त्याची गुलामी आपल्या नशिबी येईल.

قَالَ كَلَّا ۖ إِنَّ مَعِيَ رَبِّي سَيَهْدِينِ ﴿٦٢﴾

**मूसाने ने म्हटले, मुळीच नाही! खात्री बाळगा, माझा पालनकर्ता माझ्या बरोबर आहे; जो जरूर मला मार्ग दाखवीन[१] ६२**

فَأَوْحَيْنَا إِلَىٰ مُوسَىٰ أَنِ اضْرِب بِّعَصَاكَ الْبَحْرَ ۖ فَانفَلَقَ فَكَانَ كُلُّ فِرْقٍ كَالطَّوْدِ الْعَظِيمِ ﴿٦٣﴾

**आम्ही मूसाकडे वह्य पाठविले की समुद्रावर आपली काठी मार.[२] बस! त्याचवेळी, समुद्र फाटून गेला. आणि प्रत्येक पाण्याचा हिस्सा, मोठ्या पर्वतासारखा होऊन गेला.[३] ६३**

وَأَزْلَفْنَا ثَمَّ الْآخَرِينَ ﴿٦٤﴾

**आणि आम्ही याच जागी दुसऱ्यांना आणून उभे करून दिले[४] ६४**

وَأَنجَيْنَا مُوسَىٰ وَمَن مَّعَهُ أَجْمَعِينَ ﴿٦٥﴾

**आणि मूसाला आणि त्याच्या तमाम साथीदारांना सुटका देऊन दिली ६५**

ثُمَّ أَغْرَقْنَا الْآخَرِينَ ﴿٦٦﴾

**आणि मग दुसऱ्या सर्वांना, बुडवून टाकले[५] ६६**

إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَةً ۖ وَمَا كَانَ أَكْثَرُهُم مُّؤْمِنِينَ ﴿٦٧﴾

**नि:संशय यात एक मोठा धडा आहे. आणि त्यांच्यातील बहुतेक लोक, ईमानवाले नव्हते.[६] ६७**

وَإِنَّ رَبَّكَ لَهُوَ الْعَزِيزُ الرَّحِيمُ ﴿٦٨﴾

**आणि नि:संशय, तुमचा पालनकर्ता, मोठाच सामर्थ्यवान आणि दयाळू आहे. ६८**

وَاتْلُ عَلَيْهِمْ نَبَأَ إِبْرَاهِيمَ ﴿٦٩﴾

**त्यांना इब्राहीमची गोष्ट, पण ऐकवून द्या, ६९**

إِذْ قَالَ لِأَبِيهِ وَقَوْمِهِ مَا تَعْبُدُونَ ﴿٧٠﴾

**जेव्हा की त्यांनी आपला बाप, आणि आपल्या लोकांना सांगितले की, तुम्ही कोणाची उपासना करतात ? ७०**

قَالُوا نَعْبُدُ أَصْنَامًا فَنَظَلُّ لَهَا عَاكِفِينَ ﴿٧١﴾

**त्यांनी उत्तर दिले की, आम्ही मूर्त्यांची उपासना करतो! आम्ही तर बरोबर त्यांचीच सेवा चाकरी करीत रहातो.[७] ७१**

قَالَ هَلْ يَسْمَعُونَكُمْ إِذْ تَدْعُونَ ﴿٧٢﴾

**त्यांनी विचारले की, जेव्हा तुम्ही त्यांना बोलावितात, तेव्हा काय ते ऐकत पण असतात? ७२**

أَوْ يَنفَعُونَكُمْ أَوْ يَضُرُّونَ ﴿٧٣﴾

**किंवा तुम्हास नफा, नुकसान पण पोहचवू शकतात?[८] ७३**

१) ह.मूसा (अलैहिस्सलाम) नी सांत्वन केले की, तुमचा अंदेशा बरोबर नाही. आता दुसऱ्यांदा तुम्ही फिरऔनाच्या पकडीत जाणार नाहीत. माझा पालनकर्ता खचित्‌च सुटकेचा मार्ग दाखवीन.

२) तात्पर्य, अल्लाहने हे मार्गदर्शन केले की, आपली काठी समुद्रावर मार. ज्यामुळे उजवीकडील पाणी उजवीकडे, आणि डाव्याकडील पाणी, डावीकडे थांबून गेले. आणि दोहोंच्या दर्म्यान रस्ता बनून गेला. असे सांगण्यात येते की, बारा घराण्यांच्या हिशेबाने, बारा रस्ते बनून गेले होते. वल्लाह अअलम!

३) म्हणजे पाण्याचा प्रत्येक भाग, मोठ्या पर्वतासारखा उभा राहिला. हा अल्लाहतआलाकडून चमत्कार घडला. की, मूसा (अलैहिस्सलाम) आणि त्यांच्या लोकांनी फिरऔनकडून मुक्तता मिळवावी. अल्लाहच्या या पाठिंब्याशिवाय, फिरऔनकडून सुटका शक्य नव्हती.

४) याच्याने अभिप्रेत, फिरऔन आणि त्याचे सैन्य आहे. म्हणजे, आम्ही दुसऱ्यांना समुद्राच्या जवळ करून दिले.

५) मूसा आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांना, आम्ही सुटका दिली; आणि फिरऔन आणि त्याचे सैन्य, जेव्हा याच रस्त्याने जाऊ लागले, तेव्हांआम्ही समुद्राला, दुसऱ्यांदा, नेहमीप्रमाणे चालू करून दिले; ज्यामुळे फिरऔन त्याच्या सैन्यासह बुडून गेला.

६) म्हणजे जरी या घटनेत, जी अल्लाहची मदत आणि सहाय्याचे खुले प्रदर्शन आहे, मोठी निशाणी आहे. परंतु असे असून सुद्धा, बहुतेक लोक ईमान आणणार नाहीत.

७) म्हणजे रात्रंदिवस त्यांची उपासना करीत आहोत.

८) म्हणजे जर तुम्ही त्यांची उपासना बंद केली तर, काय ते तुम्हास नुकसान पोहचवू शकतात?

قَالُوْا بَلْ وَجَدْنَآ اٰبَآءَنَا كَذٰلِكَ يَفْعَلُوْنَ ۝٧٤
त्यांनी सांगितले, (हे आम्ही जाणत नाही;) आम्ही तर आमच्या वाडवडीलांना असेच करतांना पावलो आहेत[१] ७४

قَالَ اَفَرَءَيْتُمْ مَّا كُنْتُمْ تَعْبُدُوْنَ ۝٧٥
आपण सांगितले, काही ठाऊक [२] पण आहे ज्यांची तुम्ही पुजा करतात; ७५

اَنْتُمْ وَاٰبَآؤُكُمُ الْاَقْدَمُوْنَ ۝٧٦
तुम्ही, आणि तुमच्या पूर्वीचे वाडवडील हे सर्व माझे शत्रू आहेत[३] ७६

فَاِنَّهُمْ عَدُوٌّ لِّيْٓ اِلَّا رَبَّ الْعٰلَمِيْنَ ۝٧٧
त्या खऱ्या अल्लाहतआलाशिवाय जो सकल जगाचा पालनकर्ता आहे[४] ७७

الَّذِيْ خَلَقَنِيْ فَهُوَ يَهْدِيْنِ ۝٧٨
ज्याने मला निर्माण केले आहे; आणि तोच माझे मार्गदर्शन करतो[५] ७८

وَالَّذِيْ هُوَ يُطْعِمُنِيْ وَيَسْقِيْنِ ۝٧٩
तोंच आहे, जो मला खाऊ पिऊ घालतो[६] ७९

وَاِذَا مَرِضْتُ فَهُوَ يَشْفِيْنِ ۝٨٠
आणि जेव्हा मी आजारी पडतो, तेव्हा तोच मला, बरे करतो[७] ८०

وَالَّذِيْ يُمِيْتُنِيْ ثُمَّ يُحْيِيْنِ ۝٨١
आणि तोच मला मारून टाकीन, मग जिवंत करून देईन[८] ८१

وَالَّذِيْٓ اَطْمَعُ اَنْ يَّغْفِرَ لِيْ خَطِيْٓـَٔتِيْ يَوْمَ الدِّيْنِ ۝٨٢
आणि ज्याच्याशी मी आशा बाळगून आहे की, तो बदल्याच्या दिवशी माझ्या अपराधांना क्षमा करून टाकीन[९] ८२

رَبِّ هَبْ لِيْ حُكْمًا وَّاَلْحِقْنِيْ بِالصّٰلِحِيْنَ ۝٨٣
हे माझ्या पालनकर्त्या! मला फैसला करण्याचे ज्ञान प्रदान कर! [१०] आणि मला (आपल्या) चांगल्या लोकांत मिळवून दे! ८३

१) जेंव्हा ते ह.इब्राहीम عليه السلام च्या प्रश्नांचे काही योग्य उत्तर देऊ शकले नाहीत, तर हे सांगून, सुटका करून घेतली. जसे आजपण लोकांना, कुरआन व हदीसची गोष्ट सांगितली जाईल, तर हीच सबब पुढे केली जाते की, आमच्या घराण्यांत, तर आमच्या वाडवडीलांकडून, हेच काही होत आले आहे; आम्ही त्याला सोडूशकत नाही.

२) 'अफर अयुतुम' चा अर्थ आहे, काय तुम्ही चिंतन मनन केले?

३) यासाठी की तुम्ही सर्व, अल्लाहला सोडून, दुसऱ्याची उपासना करणारे आहेत. काहींनी याचा अर्थ हा सांगितला आहे की, ज्यांची तुम्ही आणि तुमचे वाडवडील, उपासना करीत आहांत, ते सर्व उपास्य माझे शत्रु आहेत. म्हणजे मी त्यांच्यापासून अलिप्त आहे.

४) म्हणजे तो शत्रू नाही; किंबहुना तो तर इहलोकांत आणि परलोकांत, माझा मित्र आहे.

५) म्हणजे इहलोक आणि परलोकांतील, चांगलेपणा आणि फायद्यांकडे.

६) म्हणजे निरनिराळ्या प्रकारची खाद्ये निर्माण करणारा, आणि जे पाणी आम्ही पितो, त्याला मिळवून देणारा, पण अल्लाहच आहे.

७) आजाराला दूर करून, बरे करणारा पण अल्लाहच आहे. म्हणजे औषधांमध्ये बरे करण्याचा परिणाम पण, त्याच्याच हुकुमाने आहे. नाहीतर औषधे पण परिणामरहित सिद्ध होतात. आजार जरी अल्लाहच्या हुकूम आणि मर्जीने येत असतात, परंतु याचा संबंध अल्लाहशी जोडला नाही; किंबहुना आपल्याकडेच केला. हे जणू अल्लाहच्या स्मरणांत, त्याची प्रतिष्ठा आणि मानसन्मानाला, सुरक्षित ठेवले.

८) म्हणजे कयामतच्या दिवशी, जेव्हा तो सर्व लोकांना जिवंत करीन, मला पण जिवंत करीन.

९) येथे, आशा भरोशाच्या अर्थात आहे. कारण की, कोण्या मोठ्या व्यक्तीत्वाशी आशा, भरोशामुळेच होते. आणि अल्लाहतआला तर विश्वातील सर्वांत मोठे व्यक्तित्व आहे. त्याच्याशी संबंधित आशा, खात्रीपूर्वक कांअसणार नाही? याचसाठी भाष्यकार म्हणतात की, कुरआनामध्ये जेथे कोठेही अल्लाहकरीता 'असा'चा शब्द उपयोगात आणला गेला आहे, तो भरवशाच्या अर्थांतच आहे, 'खतीअती', 'खतीअतून' एकवचनचा 'सेगा' आहे. परंतु 'खताया' (अनेकवचन) च्या अर्थांत आहे. पैगंबर عليه السلام लोक जरी निष्पाप असतात; म्हणून त्यांच्याकडून कोण्या मोठ्या गुन्ह्याचे घडून येणे शक्य नाही. परंतु ''हसनात्तुल अबरार, सैयआतुल मुकर्रबीन'' च्या अंतर्गत, पैगंबर तरी सुद्धा, आपल्या काही कर्मांना, कोताई समजून अल्लाहच्या समक्ष, क्षमा मागतील.

१०) हुकूम किंवा हिकमतने अभिप्रेत, ज्ञान आणि शहाणपण, किंवा पैगंबरी, किंवा अल्लाहच्या मर्यादा आणि आदेशांची ओळख आहे.

| | |
|---|---|
| وَاجْعَلْ لِّيْ لِسَانَ صِدْقٍ فِي الْاٰخِرِيْنَ ﴿٨٤﴾ | **आणि माझा चांगला उल्लेख (माझ्या) मागून येणाऱ्या लोकांत कायम ठेव[१] ८४** |
| وَاجْعَلْنِيْ مِنْ وَّرَثَةِ جَنَّةِ النَّعِيْمِ ﴿٨٥﴾ | **आणि मला देणग्यांवाल्या स्वर्गाच्या, वारिसदारांपैकी (एक वारिस) बनव ८५** |
| وَاغْفِرْ لِاَبِيْۤ اِنَّهٗ كَانَ مِنَ الضَّآلِّيْنَ ﴿٨٦﴾ | **आणि माझ्या बापास क्षमा कर, की, खचित्च तो वाट चुकलेल्यांपैकी होता.[२] ८६** |
| وَلَا تُخْزِنِيْ يَوْمَ يُبْعَثُوْنَ ﴿٨٧﴾ | **आणि ज्या दिवशी, लोक दुसऱ्यांदा जिवंत केले जातील, मला फजीत करू नकोस[३] ८७** |
| يَوْمَ لَا يَنْفَعُ مَالٌ وَّلَا بَنُوْنَ ﴿٨٨﴾ | **ज्या दिवशी द्रव्य आणि संतती काही कामा येणार नाही ८८** |
| اِلَّا مَنْ اَتَى اللّٰهَ بِقَلْبٍ سَلِيْمٍ ﴿٨٩﴾ | **परंतु फायदा घेणारा तोच राहील, जो अल्लाहतआलाच्या समोर, निर्मल अंत:करण घेऊन जाईल[४] ८९** |
| وَاُزْلِفَتِ الْجَنَّةُ لِلْمُتَّقِيْنَ ﴿٩٠﴾ | **आणि भिऊन वागणाऱ्यांकरीता, स्वर्ग बिल्कुल जवळ आणला जाईल ९०** |
| وَبُرِّزَتِ الْجَحِيْمُ لِلْغٰوِيْنَ ﴿٩١﴾ | **आणि आडमार्गी भटकणाऱ्या लोकांसाठी, नरकाग्नी जाहीर केला जाईल.[५] ९१** |
| وَقِيْلَ لَهُمْ اَيْنَمَا كُنْتُمْ تَعْبُدُوْنَ ﴿٩٢﴾ | **आणि त्यांना विचारण्यात येईल, ज्यांची तुम्ही पुजा करीत राहिला आहांत, ते कोठे आहेत? ९२** |
| مِنْ دُوْنِ اللّٰهِ ؕ هَلْ يَنْصُرُوْنَكُمْ اَوْ يَنْتَصِرُوْنَ ﴿٩٣﴾ | **जे अल्लाहतआलाशिवाय होते, काय ते तुमची मदत करणार आहेत? किंवा कोणी बदला घेऊ शकतात?[६] ९३** |

१) म्हणजे जे लोक, माझ्या नंतर, कयामतपर्यंत येतील त्यांनी माझा उल्लेख चांगल्या शब्दांत करत रहावा. याने ठाऊक झाले की, पुण्यकर्मांचा बदला, अल्लाहतआला, या जगांत, चांगल्या स्मरणाने, आणि चांगल्या गौरवाच्या स्वरूपांत पण देत असतो. जसे, ह.इब्राहीम عليه السلام चे स्मरण, प्रत्येक धर्माचे लोक करीत असतात. कोणाला पण त्यांच्या महात्म्याचा आणि आदर सन्मानाचा इन्कार नाही.

२) ही प्रार्थना त्यावेळी केली होती, जेव्हांहे त्यांच्यावर स्पष्ट झाले नव्हते की, मुशरिक (अल्लाहचे शत्रु) करीतां, क्षमेची प्रार्थना योग्य नाही. जेव्हा अल्लाहने हे स्पष्ट करून दिले, तेव्हा त्यांनी आपल्या पित्याकडून पण अलिप्तता जाहिर करून टाकली. (सू.तौबा - ११४)

३) म्हणजे सर्व लोकांसमोर, माझी पकड करून, किंवा, शिक्षा देऊन; हदीसमध्ये येते की, कयामतच्या दिवशी, जेव्हा ह.इब्राहीम عليه السلام आपल्या पित्याला, वाईट स्थितीत पाहतील, तर एकदा पुन्हा, अल्लाहच्या समोर, त्याच्या क्षमेची याचना करतील. आणि म्हणतील, हे अल्लाह! याच्यापेक्षा जास्त, माझी आणखी काय फजिती असेल ? अल्लाहतआला फर्मावील, की मी स्वर्गाला, काफिरांसाठी हराम करून टाकले आहे. मग त्यांच्या पित्याला घाणीत माखवून, विंचवाच्या रूपांत, नरकाग्नीत टाकून देण्यात येईल. (स.बुखारी)

४) निर्मल अंत:करण किंवा दोष रहित अंत:करण, ने अभिप्रेत अंत:करण आहे, जे शिर्ककडून पाक (साफ) असेल. म्हणजे ईमानवाल्यांचे अंत:करण. म्हणून काफिर आणि दांभिकांचे (मनाफिक) अंत:करण, आजारी असते. काही म्हणतात की, बिदअतने रिक्त, आणि सुन्नतवर समाधानी मन; काहींच्या जवळ, ऐहिक द्रव्य संपत्तीच्या प्रेमापासून पवित्र मन आणि काहींच्या जवळ अज्ञानाचा अंध:कार आणि चारित्र्याच्या गिरावटीपासून पवित्र मन. हे सर्व भावार्थ पण बरोबर असू शकतात. यासाठी की, ईमानवाल्यांचे अंत:करण पण, वरील सर्व वाईट गोष्टींपासून पवित्र असते.

५) अर्थ हा आहे की, स्वर्ग आणि नर्काच्या प्रवेशापूर्वी, यांना पुढे करून देण्यांत येईल, ज्यामुळे काफिरांच्या दु:खात, आणि ईमानवाल्यांच्या आनंदात, आणखी वाढ होऊन जाईल.

६) म्हणजे तुमच्यावरून शिक्षा टाळून देईल किंवा स्वत: आपल्या जिवाला यापासून वांचवून घ्याल.

| | |
|---|---|
| मग, ते सर्व, आणि सर्व वांट चुकलेले लोक, नरकात तोंडघशी ढकलून दिले जातील.[१] ९४ | فَكُبْكِبُوا فِيهَا هُمْ وَالْغَاوُونَ ۝٩٤ |
| आणि शैतानाची सर्व सैन्ये, पण[२] ९५ | وَجُنُودُ إِبْلِيسَ أَجْمَعُونَ ۝٩٥ |
| तेथे आपसात लढत झगडत म्हणतील; ९६ | قَالُوا وَهُمْ فِيهَا يَخْتَصِمُونَ ۝٩٦ |
| की, अल्लाहची शपथ! खचित्‌च आम्ही धडधडीत चुकीत होतो ९७ | تَاللَّهِ إِنْ كُنَّا لَفِي ضَلَالٍ مُبِينٍ ۝٩٧ |
| जेव्हा की, तुम्हास, सकल जगाच्या पालनकर्त्याबरोबर समजत होतो.[३] ९८ | إِذْ نُسَوِّيكُمْ بِرَبِّ الْعَالَمِينَ ۝٩٨ |
| आणि आम्हास तर या पाप्यांच्या शिवाय, आणखी कोणी बहकविले नव्हते[४] ९९ | وَمَا أَضَلَّنَا إِلَّا الْمُجْرِمُونَ ۝٩٩ |
| आतांतर आमचा कोणी शिफारशीपण नाही १०० | فَمَا لَنَا مِنْ شَافِعِينَ ۝١٠٠ |
| न कोणी (खरा) कळकळ करणारा, आणि मित्र[५] १०१ | وَلَا صَدِيقٍ حَمِيمٍ ۝١٠١ |
| जर कदाचित् आम्हास, एक वेळा पुन्हा, परत जाणे मिळते, तर आम्ही पक्के सच्चे ईमानवाले होऊन जातो[६] १०२ | فَلَوْ أَنَّ لَنَا كَرَّةً فَنَكُونَ مِنَ الْمُؤْمِنِينَ ۝١٠٢ |
| हा, वृत्तांत खचित्‌च, एक जबरदस्त निशाणी आहे;[७] आणि यांच्यातून बहुतेक लोक ईमान आणणारे नाहीत[८] १०३ | إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَةً ۖ وَمَا كَانَ أَكْثَرُهُمْ مُؤْمِنِينَ ۝١٠٣ |
| आणि खचित्‌च तुमचा पालनकर्ताच सामर्थ्यवान आणि दयाळू आहे. १०४ | وَإِنَّ رَبَّكَ لَهُوَ الْعَزِيزُ الرَّحِيمُ ۝١٠٤ |
| नूहच्या लोकांनी पण पैगंबरांना खोटे ठरवले.[९] १०५ | كَذَّبَتْ قَوْمُ نُوحٍ الْمُرْسَلِينَ ۝١٠٥ |

१) म्हणजे उपास्य आणि भक्त, सर्वांना जनावरांसारखे, एक दुसऱ्यांवर टाकून देण्यात येईल.
२) याच्याने अभिप्रेत ती सैन्य आहेत, जी लोकांना बहकवित असत.
३) जगांत तर प्रत्येक कोरलेला दगड, आणि कबरीवर बनविलेला सुंदर दिसणारा घुमट, मुशरिकांना, अल्लाहच्या अधिकारांना धारण करणारा वाटत असतो. परंतु कयामतच्या दिवशी ठाऊक होऊन जाईन की, हे तर स्पष्ट बहकलेले होते, की ते त्यांना अल्लाहच्या बरोबर समजत राहिले.
४) म्हणजे तेथे गेल्यावर जाणीव होईल की, आम्हास दुसऱ्या अपराधांनी बहकविले. जगांत त्यांचे लक्ष वेधले जाते की, अमुक अमुक काम मार्गभ्रष्टता आहे, बिदअत आहे, शिर्क, तर ऐकत नाही. आणि चिंतन आणि मनन करीत नाही. की, सत्य आणि असत्य त्यांच्यावर स्पष्ट होऊ शकावे.
५) गुन्हेगार ईमानवाल्यांची शिफारस तर, अल्लाहच्या परवानगीनंतर, पैगंबर आणि पुण्यवान लोक, खास करून नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम करतील. परंतु काफिर आणि मुशरिकांकरीता, शिफारस करण्याची कोणास न परवानगी न हिंमत असेल आणि तेथे कोणी मैत्री कामास येणार नाही.
६) कुफ्र आणि शिर्कवाले, कयामतच्या दिवशी, दुसऱ्यादा जगात येण्याची आकांक्षा करतील. कारण की त्यांनी अल्लाहचे आज्ञापालन करून, अल्लाहला खूष करून घ्यावे. परंतु अल्लाहतआलाने दुसऱ्या ठिकाणी सांगितले आहे की, जर त्यांना दुसऱ्यांदापण जगात पाठवून देण्यात येईल, तर तेच काही करतील, जे पूर्वी करीत राहिले होते..
७) म्हणजे ह.इब्राहीम عليه السلام च्या मूर्तींच्या बाबतीत, आपल्या लोकांशी वादविवाद आणि भांडण, आणि अल्लाहच्या एकेश्वरवादाची प्रमाणे, ही या गोष्टीची स्पष्ट निशाणी आहे की, अल्लाहशिवाय अन्य कोणी उपास्य नाही.
८) काहींनी याचा मर्जा, मक्केचे मुशरिक लोक, यांना ठरविले आहे, म्हणजे यांचे बहुसंख्य लोक ईमान आणणार नाहीत.
९) नूह عليه السلام च्या लोकांनी जरी, फक्त आपले पैगंबर ह.नूह عليه السلام ला खोटे ठरविले होते; परंतु, एका पैगंबराला खोटे म्हणणे, सर्व पैगंबरांना खोटे म्हणण्याच्या शिक्षेला पात्र आहे; म्हणून म्हटले की, नूह عليه السلام च्या लोकांनी, पैगंबरांना खोटे म्हटले

| | |
|---|---|
| إِذْ قَالَ لَهُمْ أَخُوهُمْ نُوحٌ أَلَا تَتَّقُونَ ﴿١٠٦﴾ | जेव्हा की, त्यांचा भाऊ[१] नूहने त्यांना सांगितले, काय तुम्ही अल्लाहला भित नाहीत? ﴿१०६﴾ |
| إِنِّي لَكُمْ رَسُولٌ أَمِينٌ ﴿١٠٧﴾ | ऐका! मी तुमच्याकडे अल्लाहचा विश्वसनीय पैगंबर[२] आहे. ﴿१०७﴾ |
| فَاتَّقُوا اللَّهَ وَأَطِيعُونِ ﴿١٠٨﴾ | मग, तुम्हास अल्लाहला भ्याले पाहिजे, आणि माझी गोष्ट मानली पाहिजे.[३] ﴿१०८﴾ |
| وَمَا أَسْأَلُكُمْ عَلَيْهِ مِنْ أَجْرٍ إِنْ أَجْرِيَ إِلَّا عَلَىٰ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿١٠٩﴾ | मी, तुमच्याकडून काही बदला इच्छित नाही; माझा बदला तर सकल जगाच्या पालनकर्त्याकडे आहे.[४] ﴿१०९﴾ |
| فَاتَّقُوا اللَّهَ وَأَطِيعُونِ ﴿١١٠﴾ | बस! तुम्ही अल्लाहचे भय बाळगा, आणि माझे आज्ञापालन करा.[५] ﴿११०﴾ |
| قَالُوا أَنُؤْمِنُ لَكَ وَاتَّبَعَكَ الْأَرْذَلُونَ ﴿١١١﴾ | त्याच्या लोकांनी उत्तर दिले की, काय आम्ही तुझ्यावर ईमान आणावे? तुझे आज्ञापालन तर कनिष्ठ लोकांनी केले आहे.[६] ﴿१११﴾ |
| قَالَ وَمَا عِلْمِي بِمَا كَانُوا يَعْمَلُونَ ﴿١١٢﴾ | त्यांनी सांगितले की, मला काय ठाऊक की पूर्वी ते काय करीत राहिले?[७] ﴿११२﴾ |
| إِنْ حِسَابُهُمْ إِلَّا عَلَىٰ رَبِّي لَوْ تَشْعُرُونَ ﴿١١٣﴾ | त्यांचा हिशेब तर माझ्या पालनकर्त्याकडे[८] आहे; जर तुम्ही समजत असाल तर ﴿११३﴾ |
| وَمَا أَنَا بِطَارِدِ الْمُؤْمِنِينَ ﴿١١٤﴾ | मी ज्यांनी ईमान आणले, त्यांना काढून देणारा नाही.[९] ﴿११४﴾ |
| إِنْ أَنَا إِلَّا نَذِيرٌ مُبِينٌ ﴿١١٥﴾ | मी तर स्पष्टपणे भिवविणारा आहे.[१०] ﴿११५﴾ |
| قَالُوا لَئِنْ لَمْ تَنْتَهِ يَا نُوحُ لَتَكُونَنَّ مِنَ الْمَرْجُومِينَ ﴿١١٦﴾ | त्यांनी म्हटले की, हे नूह! जर तू (या गोष्टीपासून) परावृत्त झाला नाहीस, तर खचित्‌च तुला धोंडमार केली जाईल ﴿११६﴾ |

१) भाऊ यासाठी म्हटले की, ह.नूह عليه السلام त्यांच्याच समाजाचे एक माणूस होते.

२) म्हणजे अल्लाहने जो संदेश देऊन मला पाठविले आहे, तो कमी जास्त केल्याशिवाय, तुमच्याजवळ पोहचवूंन देणारा आहे, त्याच्यात कमी जास्त करीत नाही.

३) म्हणजे मी जे तुम्हांस, अल्लाहवर ईमान, आणि शिर्क न करण्याचे आवाहन करीत आहे, यांत माझे आज्ञापालन करा.

४) मी तुम्हांस जो प्रचार करीत आहे, त्याचा काही बदला मागत नाही; किंबहुना याचा बदला सकल जगांच्या पालनकर्त्याकडे आहे; जो कयामतच्या दिवशी, तो प्रदान करील.

५) हे ताकीद म्हणून पण आहे, आणि वेगवेगळ्या कारणांमुळे पण; पहिले आज्ञापालनाचे आवाहन, सच्चेपणाच्या आधारावर होते. आणि आता हे आज्ञापालनाचे आवाहन, कुठल्याही लालचे शिवाय आहे.

६) 'अर्‌जलून' 'अर्‌जल' चे अनेकवचन आहे. प्रतिष्ठा आणि द्रव्य न बाळगणारे; आणि यामुळे समाजांत कनिष्ठ समजले जाणारे; आणि यांच्यातच ते लोक पण येऊन जातात, जे क्षुल्लक समजल्या जाणाऱ्या धंद्याशी संबंध बाळगतात.

७) म्हणजे मला या गोष्टीसाठी जबाबदार धरण्यात आले नाही, की, मी लोकांची जात पात, खानदान, श्रीमंती, गरीबी आणि त्यांच्या धंद्याची चौकशी करावी. किंबहुना माझी जबाबदारी फक्त ही आहे की, ईमान आणण्याचे आवाहन करावे आणि जो याला मान्य करून घेईल, मग जरी तो कुठल्याही दर्जाचा असेल, त्याला माझ्या समूहांत दाखल करून घ्यावे.

८) म्हणजे त्यांची अंत:करणे आणि कर्मे, यांची शहानिशा करणे, हे अल्लाहचे काम आहे.

९) हे त्यांच्या या इच्छेचे उत्तर आहे की, कनिष्ठ दर्जाच्या लोकांना आपल्या पासून दूर करून द्यावे, मग आम्ही तुझ्या समूहांत दाखल होऊन जाऊ.

१०) मग जो अल्लाहला भिऊन माझे आज्ञापालन करेल, तो माझा आहे; आणि मी त्याचा आहे. मग जरी तो जगाच्या दृष्टीने प्रतिष्ठीत असो वा अप्रतिष्ठीत, शानवाला असो वा क्षुल्लक.

| | |
|---|---|
| त्यांनी म्हटले की हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या लोकांनी मला खोटे ठरविले ११७ | قَالَ رَبِّ اِنَّ قَوْمِيْ كَذَّبُوْنِ ۝١١٧ |
| बस! तू (आता) माझ्यांत आणि यांच्यात काही निर्णायक फैसला करून दे. आणि मला आणि माझ्या ईमानवाल्या साथीदारांना मुक्ती दे ११८ | فَافْتَحْ بَيْنِيْ وَبَيْنَهُمْ فَتْحًا وَّنَجِّنِيْ وَمَنْ مَّعِيَ مِنَ الْمُؤْمِنِيْنَ ۝١١٨ |
| तात्पर्य, आम्ही त्यास आणि त्याच्या साथीदारांस, भरलेल्या नांवेत स्वार करून, (सुटका करून) दिली ११९ | فَاَنْجَيْنٰهُ وَمَنْ مَّعَهٗ فِي الْفُلْكِ الْمَشْحُوْنِ ۝١١٩ |
| त्यानंतर, बाकी सर्व लोकांना, आम्ही बुडवून टाकले[१] १२० | ثُمَّ اَغْرَقْنَا بَعْدُ الْبٰقِيْنَ ۝١٢٠ |
| खचितच यामध्ये एक फार मोठा धडा आहे, याच्यातून बहुतेक लोक ईमानवाले पण नव्हते. १२१ | اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيَةً ۭ وَمَا كَانَ اَكْثَرُهُمْ مُّؤْمِنِيْنَ ۝١٢١ |
| आणि नि:संशय तुमचा पालनकर्ता, अलबत्च मोठा सामर्थ्यवान आणि (परम) दयाळू आहे. १२२ | وَاِنَّ رَبَّكَ لَهُوَ الْعَزِيْزُ الرَّحِيْمُ ۝١٢٢ |
| आदच्या लोकांनीपण पैगंबरांना खोटे ठरवले.[२] १२३ | كَذَّبَتْ عَادُ ۨ الْمُرْسَلِيْنَ ۝١٢٣ |
| जेव्हा की त्यांना, त्यांचा भाऊ हूद ने [३] म्हटले की काय तुम्ही भित नाहीत ? १२४ | اِذْ قَالَ لَهُمْ اَخُوْهُمْ هُوْدٌ اَلَا تَتَّقُوْنَ ۝١٢٤ |
| मी तुमचा विश्वसनीय प्रामाणिक पैगंबर आहे १२५ | اِنِّيْ لَكُمْ رَسُوْلٌ اَمِيْنٌ ۝١٢٥ |
| तर अल्लाहला भ्या आणि माझे अनुकरण करा. १२६ | فَاتَّقُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوْنِ ۝١٢٦ |
| आणि मी याच्यावर तुमच्याकडून काही वेतन तर मागीत नाही; माझा मोबदला तर, सकल जगाच्या पालनकर्त्याच्या जवळच आहे. १२७ | وَمَآ اَسْـَٔلُكُمْ عَلَيْهِ مِنْ اَجْرٍ ۚ اِنْ اَجْرِيَ اِلَّا عَلٰي رَبِّ الْعٰلَمِيْنَ ۝١٢٧ |
| काय तुम्ही प्रत्येक उंच जागी, एक खेळ म्हणून, स्मारके बनवितात[४] १२८ | اَتَبْنُوْنَ بِكُلِّ رِيْعٍ اٰيَةً تَعْبَثُوْنَ ۝١٢٨ |

१) हा तपशील काही पहिले पण येऊन चुकला आहे; आणि काही पुढे पण येईल, की ह.नूह عليه السلام च्या साडेनऊशे वर्षांच्या प्रचारानंतर सुद्धा, त्यांच्या समाजाचे लोक, चारित्र्यहीनता, आणि आक्षेप घेण्यावर अडिग राहिलेत. सरशेवटी ह.नूह عليه السلام ने शाप (बद्दुआ) दिला. अल्लाहतआलाने नांव बनविण्याचा, आणि त्यांत ईमानवाल्या माणसांना, जनावरांना आणि आवश्यक साजसामान ठेवण्याचा हुकूम दिला. आणि अशाप्रकारे ईमानवाल्यांना तर वांचवून घेण्यात आले, आणि बाकी सर्व लोकांना, येथपावेतो की, पत्नी आणि पुत्राला सुद्धा, ज्यांनी ईमान आणले नव्हते, बुडवून टाकण्यात आले.

२) 'आद', हे त्यांच्या खापर आजोबांचे नाव होते. ज्यांच्या नावावर, समाजाचे नाव पडून गेले.

३) 'हूद' ला पण 'आद' चा भाऊ यासाठी, संबोधण्यात आले आहे की, प्रत्येक पैगंबर त्या समाजातील एक व्यक्ती असेल ज्याच्याकडे त्याला पाठविण्यात येत असे. आणि याच अनुषंगाने, त्यांना त्या समाजाचा भाऊ ठरविण्यात आले आहे. जसे की पुढे पण येईल; आणि पैगंबराचे हे मानव असणे पण, त्यांच्या समाजाच्या ईमान आणण्यात, अडथळा राहिला आहे. त्यांची कल्पना होती की, पैगंबराला मानव नाही, मानवेतर व्हावयास पाहिजे. आजपण या वास्तव स्थितीपासून अजाण लोक, इस्लामचे पैगंबर हजरत नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला, मानवेतर ठरविण्यावर अडून राहिले आहेत. वास्तविक ते सुद्धा, कुरैश घराण्याचे एक व्यक्ती होते; ज्यांच्याकडे प्रथम, त्यांना पैगंबर बनवून पाठविण्यात आले होते. हद्दा हुमुल्लाह् तआला!

४) 'रीइन' 'रिअता' चे अनेकवचन आहे. उंच जागा, पर्वत, दरी, खिंड, हे, त्या येण्याजाण्याच्या रस्त्यावर, कोणी इमारत बांधित. ही अशा उंच जागेत एक स्मारक आणि वैशिष्टयपूर्ण असे. परंतु याचा उद्देश्य यात रहाणे हा नव्हता. किंबहुना फक्त एक करमणूक असे. ह.हूद عليه السلام नी टिका केली की, हे तुम्ही असे काम करीत आहांत, ज्याच्यांत वेळ आणि साधन सामुग्रीचा अपव्यय आहे. आणि त्याचा उद्देश्य पण असा आहे. ज्यांत इहलोक आणि परलोकाचा काही फायदा संबंधित नाही. किंबहुना याच्यात निरर्थकपणा असण्यात काही शंका नाही.

وَتَتَّخِذُوْنَ مَصَانِعَ لَعَلَّكُمْ تَخْلُدُوْنَ ﴿١٢٩﴾

**आणि भव्य कारागिरीचे (मजबूत महाल) बांधतात; जणू की, तुम्ही नेहमी येथेच राहाल[१] (१२९)**

وَاِذَا بَطَشْتُمْ بَطَشْتُمْ جَبَّارِيْنَ ﴿١٣٠﴾

**आणि जेव्हा तुम्ही कोणावर हात टाकतात, तर सक्ती आणि जुलुमाने, त्यांची पकड करतात[२] (१३०)**

فَاتَّقُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوْنِ ﴿١٣١﴾

**अल्लाहला भ्या आणि माझे अनुकरण करा.[३] (१३१)**

وَاتَّقُوا الَّذِيْٓ اَمَدَّكُمْ بِمَا تَعْلَمُوْنَ ﴿١٣٢﴾

**आणि त्याला भ्या, ज्याने या वस्तुंद्वारे तुमची मदत केली, ज्यांना तुम्ही जाणतात (१३२)**

اَمَدَّكُمْ بِاَنْعَامٍ وَّبَنِيْنَ ﴿١٣٣﴾

**त्याने तुमची मदत केली द्रव्य आणि संततीने (१३३)**

وَجَنّٰتٍ وَّعُيُوْنٍ ﴿١٣٤﴾

**आणि बागांनी आणि झऱ्यांनी (१३४)**

اِنِّيْٓ اَخَافُ عَلَيْكُمْ عَذَابَ يَوْمٍ عَظِيْمٍ ﴿١٣٥﴾

**मला तर, तुमच्या बाबतीत, मोठ्या दिवसाच्या शिक्षेचे भय आहे.[४] (१३५)**

قَالُوْا سَوَآءٌ عَلَيْنَآ اَوَعَظْتَ اَمْ لَمْ تَكُنْ مِّنَ الْوٰعِظِيْنَ ﴿١٣٦﴾

**त्यांनी सांगितले की, तुम्ही उपदेश करा, किंवा उपदेश करू नका, आम्हांवर (सर्व) समान आहे (१३६)**

اِنْ هٰذَآ اِلَّا خُلُقُ الْاَوَّلِيْنَ ﴿١٣٧﴾

**ही तर पूर्वीच्या लोकांची सवय[५] आहे. (१३७)**

وَمَا نَحْنُ بِمُعَذَّبِيْنَ ﴿١٣٨﴾

**आणि आम्ही मुळीच कुठल्याही शिक्षेत ग्रस्त होणार नाही[६] (१३८)**

فَكَذَّبُوْهُ فَاَهْلَكْنٰهُمْ ؕ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيَةً ؕ وَمَا كَانَ اَكْثَرُهُمْ مُّؤْمِنِيْنَ ﴿١٣٩﴾

**कारण की, 'आद' च्या लोकांनी हूद ला खोटे ठरवले म्हणून आम्ही त्यांस नष्ट करून टाकले;[७] खचित्‌च याच्यात (मोठी) निशाणी आहे, आणि त्यांच्यातून बहुतेक ईमानवाले नव्हते (१३९)**

१) अशाचप्रकारे ते फार मजबूत आणि आलिशान रहाण्याच्या इमारती बांधित असत; जणू काही ते यांत नेहमी राहतील.

२) हा त्यांच्या जुलूम आणि अत्त्याचार, आणि शक्तीकडे इशारा आहे.

३) जेव्हा यांच्या या वाईट संवयी वर्णन केल्या, ज्या जगात त्यांच्या गर्व, जुलुम आणि शिरजोरीचा पुरावा आहे; तर मग त्यांना दुसऱ्यांदा, ईशभय आणि आज्ञापालनाचे आमंत्रण दिले.

४) म्हणजे जर तुम्ही आपल्या कुफ्रवर, अडून राहिलात, आणि अल्लाहने ह्या ज्या देणग्या तुम्हाला प्रदान केल्या आहेत, त्याचे आभार मानले नाहीत; तर तुम्ही अल्लाहच्या शिक्षेला पात्र राहाल. ही शिक्षा जगात पण हाऊ शकते, आणि परलोकतर आहेच, शिक्षा आणि पुण्याच्या मोबदल्याकरीता, तेथे तर शिक्षेपासून सुटका शक्यच होणार नाही.

५) म्हणजे त्याच गोष्टी आहेत, ज्या पूर्वीपण लोक करीत आले आहेत. किंवा, हा अर्थ आहे की, आम्ही ज्या धर्म आणि संवयी व रितीरिवाजांवर कायम आहोत, तो तोच आहे ज्यावर आमचे वाडवडील, कार्यरत राहिलेत. दोन्ही प्रकारांत अर्थ हा आहे की, आम्ही वाडवडिलांच्या धर्माला सोडू शकत नाही.

६) जेव्हा त्यांनी ही गोष्ट जाहीर केली की, आम्ही तर आमच्या वाडवडिलांचा धर्म सोडणार नाही, तेव्हा याच्यात परलोकाच्या धारणेला नाकारणे पण होते. म्हणून त्यांनी शिक्षेत ग्रस्त होण्याला पण नाकारले. कारण की, अल्लाहच्या शिक्षेची भीती तर त्याला असते, जो अल्लाहला मानतो आणि बदला दिल्या जाणाऱ्या दिवसाला मान्य करतो.

७) आदचे लोक जगांतील मजबूत आणि शक्तीशाली होते. ज्यांच्या बाबतीत अल्लाहने सांगितले आहे, ''या सारखे लोक निर्माणच केले गेले नाहीत.'' (सू.फज्र) म्हणजे जो शक्ती आणि सामर्थ्य, आणि क्रौर्य आणि शिरजोरी, मध्ये. यांच्या सारखे असतील. म्हणूनच ते म्हणत असत, ''कोण शक्तीत आमच्यासारखा आहे ?'' (सू.हा-मीम-सजदा-१५) परंतु जेव्हा या लोकांनी सुद्धा, कुफ्रचा मार्ग सोडून, ईमान आणि ईशभय अंगिकारले नाही, तेव्हा अल्लाहने सोसाट्याच्या वाऱ्याच्या स्वरूपांत, त्यांच्यावर शिक्षा पाठविली; जी संपूर्ण सात रात्री आणि आठ दिवस, त्यांच्यावर चालू होती. चक्रीवादळ येई आणि माणसाला उचलून, आकाशांत उंच घेऊन जाई; मग जोराने, डोक्याकडून, जमिनीवर पटकून देई. ज्यामुळे त्यांचा मेंदु फुटून तुटून जाई. आणि शिराशिवाय त्यांची प्रेते, अशा प्रकारे जमिनीवर पडलेले असते, जणू ते खजुरीचे पोकळ खोड आहेत. त्यांनी पर्वत, खाया आणि गुहांमध्ये, मोठमोठ्या मजबुत इमारती बनवून ठेवल्या होत्या. पाण्यासाठी खोल विहिरी आणि बागांची विपुलता होती, परंतु जेव्हा अल्लाहची शिक्षा आली, तेव्हा कोणी वस्तू त्यांच्या काही कामा आली नाही. आणि त्यांना भूतलावरून मिटवून टाकण्यात आले.

وَاِنَّ رَبَّكَ لَهُوَ الْعَزِيْزُ الرَّحِيْمُ ﴿١٤٠﴾
**आणि नि:संशय तुमचा पालनकर्ता तोच सामर्थ्यवान आणि दयाळूआहे (१४०)**

كَذَّبَتْ ثَمُوْدُ الْمُرْسَلِيْنَ ﴿١٤١﴾
**'समूद'[१] च्या लोकांनी पैगंबरांना खोटे ठरवले. (१४१)**

اِذْ قَالَ لَهُمْ اَخُوْهُمْ صٰلِحٌ اَلَا تَتَّقُوْنَ ﴿١٤٢﴾
**जेव्हा त्यांचा भाऊ 'सॉलेह' ने त्यांना सांगितले, काय तुम्ही अल्लाहला भित नाहीत? (१४२)**

اِنِّيْ لَكُمْ رَسُوْلٌ اَمِيْنٌ ﴿١٤٣﴾
**मी तुमच्याकडे अल्लाहचा प्रामाणिक पैगंबर आहे (१४३)**

فَاتَّقُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوْنِ ﴿١٤٤﴾
**तर तुम्ही अल्लाहला भ्या आणि माझे अनुकरण करा (१४४)**

وَمَاۤ اَسْـَٔلُكُمْ عَلَيْهِ مِنْ اَجْرٍ ۚ اِنْ اَجْرِيَ اِلَّا عَلٰى رَبِّ الْعٰلَمِيْنَ ﴿١٤٥﴾
**आणि मी यावर तुमच्याकडून काही मोबदला मागीत नाही, माझा मोबदला तर फक्त, सकल जगाच्या पालनकर्त्याकडेच आहे. (१४५)**

اَتُتْرَكُوْنَ فِيْ مَا هٰهُنَاۤ اٰمِنِيْنَ ﴿١٤٦﴾
**काय या वस्तुंत, ज्या येथे आहेत, तुम्ही अभयासह सोडून दिले जाल?[२] (१४६)**

فِيْ جَنّٰتٍ وَّعُيُوْنٍ ﴿١٤٧﴾
**म्हणजे या बागांत आणि झऱ्यांत (१४७)**

وَّزُرُوْعٍ وَّنَخْلٍ طَلْعُهَا هَضِيْمٌ ﴿١٤٨﴾
**आणि त्या शेतांमध्ये, आणि त्या खजुरींच्या बागांत, ज्यांचे घोंस नरम आणि नाजूक आहेत[३] (१४८)**

وَتَنْحِتُوْنَ مِنَ الْجِبَالِ بُيُوْتًا فٰرِهِيْنَ ﴿١٤٩﴾
**आणि तुम्ही पर्वतांना कोरून कोरून आरामशीर घरे, बनवित आहांत[४] (१४९)**

فَاتَّقُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوْنِ ﴿١٥٠﴾
**तर, तुम्ही अल्लाहला भ्या, आणि माझे आज्ञापालन करा (१५०)**

وَلَا تُطِيْعُوْۤا اَمْرَ الْمُسْرِفِيْنَ ﴿١٥١﴾
**आणि मर्यादेच्या बाहेर जाणाऱ्यांच्या अनुकरणापासून, पराङ्मुख[५] होऊन जा (१५१)**

الَّذِيْنَ يُفْسِدُوْنَ فِي الْاَرْضِ وَلَا يُصْلِحُوْنَ ﴿١٥٢﴾
**जे देशांत फसाद फैलावित आहेत; आणि त्यांत सुधारणा करीत नाहीत (१५२)**

قَالُوْۤا اِنَّمَاۤ اَنْتَ مِنَ الْمُسَحَّرِيْنَ ﴿١٥٣﴾
**ते म्हणाले की, याशिवाय काही नाही की, तू त्यांच्यातून आहेस, ज्यांच्यावर जादू करून देण्यात आला (१५३)**

१) 'समूद' चे राहण्याचे ठिकाण 'हिज्र' होते. जे 'हिजाज' च्या उत्तरेला आहे. आजकाल त्याला 'मदाईने सालह' म्हणतात. (अयसरुत तफासीर) हे अरब होते. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, तबूकला जातांना, या वस्तीवरून गेले होते; जसे की, पहले येऊन चुकले आहे.

२) म्हणजे देणग्या काय तुम्हास नेहमी मिळत राहतील, तसेच तुम्हास का मृत्यू येणार नाही, आणि शिक्षा होणार नाही? भावार्थ नाकारणारा आणि कान उघाडणी करणारा आहे. म्हणजे असे होणार नाही. किंबहुना शिक्षा किंवा मृत्यूच्या मार्फत, जेव्हा अल्लाह इच्छील, तुम्ही या देणग्यांकडून वंचित् होऊन जाल. यांच्यात शिकवण आहे की, अल्लाहच्या देणग्यांचे आभार माना. आणि त्याच्यावर ईमान आणा. आणि धमकी आहे की, जर ईमान आणि आभाराचा मार्ग अनुसरला नाही, तर तबाह आणि बर्बाद होणे तुमच्या नशीबी आहे.

३) हा त्या देणग्यांचा तपशील आहे, ज्या त्यांना प्राप्त होत्या. 'तलऊन' खजुरीच्या त्या घोंसाला म्हणतात, जो पहिल्या प्रथम निघतो, म्हणजे फुटतो. याच्यानंतर खजुरीचे हे फळ, 'बलह', मग 'बुसर', मग 'रूतब', मग याच्यानंतर 'तमर' म्हणविले जाते (अयसरुत तफासीर) बागांमध्ये, दुसऱ्या फळांबरोबर, खजुरीचे फळ पण येऊन जाते. परंतु अरबांमध्ये कारण की, खजुरीला फार महत्त्व आहे म्हणून याचा विशेष उल्लेख केला. 'हजीम' चे आणखी कित्येक अर्थ सांगण्यात आले आहे. उदाहरणार्थ, लहान, नरम आणि नाजुक, एकावर एक वगैरे.

४) 'फारेहीन' म्हणजे, आवश्यकतेपेक्षा जास्त. फुशारकी आणि शेखी व कला कौशल्याची नैपुण्य दाखवित, किंवा ऐट दाखवून, आणि गर्व आणि अहंकार करत. जसे आजकाल लोकांची स्थिती आहे. आजपण इमारतींवर पण, अनावश्यक सजावट, आणि कला कौशल्याच्या निपुणतेचा देखावा होत आहे. आणि याच्या मार्फत, एक दुसऱ्यावर श्रेष्ठत्व आणि गर्व अहंकाराचा देखावा पण (केला जातो)

५) 'मुसरिफीन' ने अभिप्रेत, ते श्रीमंत आणि सरदार आहेत, जे कुफ्र शिर्कचे निमंत्रक, आणि सत्त्याच्या विरोधात, पुढेपुढे होते.

مَاۤ اَنۡتَ اِلَّا بَشَرٌ مِّثۡلُنَا ۚۖ فَاۡتِ بِاٰيَةٍ اِنۡ كُنۡتَ مِنَ الصّٰدِقِيۡنَ ﴿۱۵۴﴾

**तू तर आमच्याच सारखा एक मनुष्य आहेस, जर तू खऱ्यांपैकी आहेस, तर कोणी चमत्कार घेऊन ये** (१५४)

قَالَ هٰذِهٖ نَاقَةٌ لَّهَا شِرۡبٌ وَّلَكُمۡ شِرۡبُ يَوۡمٍ مَّعۡلُوۡمٍ ۚ ﴿۱۵۵﴾

**आपण सांगितले की, ही आहे एक उंटीण, पाणी पिण्याची एक दिवसाची पाळी इची. आणि एका दिवसाची निश्चित पाळी, पाणी पिण्याची तुमची.** [१] (१५५)

وَلَا تَمَسُّوۡهَا بِسُوۡٓءٍ فَيَاۡخُذَكُمۡ عَذَابُ يَوۡمٍ عَظِيۡمٍ ﴿۱۵۶﴾

**आणि (खबरदार)! तिला वाईट इराद्याने हात लावू नये; नाहीतर एका मोठ्या दिवसाची शिक्षा, तुम्हास येऊन पोहचेल** [२] (१५६)

فَعَقَرُوۡهَا فَاَصۡبَحُوۡا نٰدِمِيۡنَ ۙ ﴿۱۵۷﴾

**तरी सुद्धा त्यांनी तिच्या घोडशिरा कापून टाकल्यात,** [३] **मग ते फारच पश्चात्ताप पावले** [४] (१५७)

فَاَخَذَهُمُ الۡعَذَابُ ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيَةً ؕ وَمَا كَانَ اَكۡثَرُهُمۡ مُّؤۡمِنِيۡنَ ﴿۱۵۸﴾

**आणि शिक्षेने त्यांना येऊन पकडले;** [५] **नि:संशय याच्यात एक (मोठा) धडा आहे; आणि त्यांच्यातून बहुतेक लोक ईमानवाले नव्हते** (१५८)

وَاِنَّ رَبَّكَ لَهُوَ الۡعَزِيۡزُ الرَّحِيۡمُ ﴿۱۵۹﴾

**आणि नि:संशय तुमचा पालनकर्ता सामर्थ्यवान आणि दयाळूंआहे.** (१५९)

كَذَّبَتۡ قَوۡمُ لُوۡطِ ِۨالۡمُرۡسَلِيۡنَ ۚ ۖ ﴿۱۶۰﴾

**लूतच्या** [६] **लोकांनी पण पैगंबरांना खोटे ठरवले.** (१६०)

اِذۡ قَالَ لَهُمۡ اَخُوۡهُمۡ لُوۡطٌ اَلَا تَتَّقُوۡنَ ۚ ﴿۱۶۱﴾

**त्यांना, त्यांचा भाऊ लुतने म्हटले, काय तुम्ही अल्लाहला भित नाहीत?** (१६१)

اِنِّىۡ لَكُمۡ رَسُوۡلٌ اَمِيۡنٌ ۙ ﴿۱۶۲﴾

**मी तुमच्याकडे (एक) प्रामाणिक पैगंबर आहे.** (१६२)

فَاتَّقُوا اللّٰهَ وَاَطِيۡعُوۡنِ ۚ ﴿۱۶۳﴾

**तुम्ही अल्लाहला भ्या आणि माझे अनुकरण करा** (१६३)

وَمَاۤ اَسۡـَٔـلُكُمۡ عَلَيۡهِ مِنۡ اَجۡرٍ ۚ اِنۡ اَجۡرِىَ اِلَّا عَلٰى رَبِّ الۡعٰلَمِيۡنَ ؕ ﴿۱۶۴﴾

**आणि मी याच्यावर तुमच्यापासून काही मोबदला मागीत नाही. माझा मोबदला तर फक्त अल्लाहतआलावर आहे, जो सकल जगाचा पालनकर्ता आहे.** (१६४)

१) ही तीच उंटीण होती, जी यांच्या मागणीवर, दगडाच्या एका शिळेतीून, चमत्कार म्हणून, जाहीर झाली होती. एक दिवस उंटीणसाठी, आणि एक दिवस त्यांच्यासाठी पाणी निश्चित करून दिले गेले होते. आणि त्यांना सांगून देण्यांत आले होते की, जो दिवस तुमचा पाणी घेण्याचा असेल, उंटीण घाटावर येणार नाही; आणि जो दिवस उंटिणीचा पाणी पिण्याचा असेल, तुम्हास घाटावर येण्याची परवानगी नाही.

२) दुसरी गोष्ट त्यांना ही सांगण्यात आली की, या उंटिणीला कोणी वाईट इराद्याने हात लावू नये. तात्पर्य, ही उंटीण अशा प्रकारे त्यांच्यात राहिली. घाटांतून पाणी पिई, आणि गवत चारा खाऊन गुजरा करीत असे. आणि असे म्हणतात 'समूद' चे लोक तिचे दूध काढीत असत, आणि तिच्यापासून फायदा उचलित. परंतु काही काळ लोटल्यानंतर, त्यांनी तिला ठार करण्याची योजना बनविली.

३) म्हणजे असे असून सुद्धा, की उंटीण अल्लाहच्या सामर्थ्याची एक निशाणी, आणि पैगंबराच्या सत्त्येचा एक पुरावा होती; समूदच्या लोकांनी ईमान आणले नाही; आणि कुफ्र आणि शिर्कच्या रस्त्यावर चालत राहिले. आणि त्यांची शिरजोरी येथपावेतो वाढली की, सरशेवटी अल्लाहच्या सामर्थ्याचे जिवंत निशाण-उंटीणच्या घोडशिरा कापून टाकल्या; म्हणजे तिच्या हातापायांना जखमी करून टाकले. ज्यामुळे ती बसून गेली. आणि मग तिला ठार करून टाकले.

४) हे त्यावेळी झाले, जेव्हा उंटीणला ठार केल्यानंतर, ह.सॉलेह عليه السلام नी सांगितले, आता तुम्हाला फक्त तीन दिवसाची सवलत आहे; चवथ्या दिवशी तुम्हाला नष्ट करून टाकण्यात येईल. याच्यानंतर जेव्हा खरोखर शिक्षेची चिन्हे दिसणे, सुरू होऊन गेले; तेव्हा मग त्यांच्याकडून पण पश्चात्ताप व्यक्त केला जाऊ लागला. परंतु शिक्षेची चिन्हे पाहून घेतल्यानंतर, पश्चात्ताप आणि तौबाचा काही फायदा नाही.

५) ही शिक्षा जमिनीतून भूकंप, आणि वरून कडक गर्जना, या स्वरूपांत आली. ज्यामुळे सर्व मृत्यू पावले.

६) ह.लूत عليه السلام ह.इब्राहीम عليه السلام चे भाऊ, हारान बिन आजर चे पुत्र होते. यांना ह.इब्राहीम عليه السلام च्या जीवनांतच, पैगंबर बनवून पाठविण्यात आले होते. त्यांचे लोक 'सदूम' आणि 'अमुरिया' मध्ये राहत असत. या वस्त्या सीरियाच्या इलाख्यात होत्या.

أَتَأْتُونَ الذُّكْرَانَ مِنَ الْعَالَمِينَ ﴿١٦٥﴾

काय तुम्ही जगातल्या लोकांकडून, पुरूषांच्या जवळ येतात? १६५

وَتَذَرُونَ مَا خَلَقَ لَكُمْ رَبُّكُمْ مِنْ أَزْوَاجِكُمْ ۚ بَلْ أَنْتُمْ قَوْمٌ عَادُونَ ﴿١٦٦﴾

आणि तुमच्या ज्या स्त्रियांना अल्लाहतआलाने तुमच्या पत्न्या बनविल्या आहेत, त्यांना सोडून देतात. [१] गोष्ट ही आहे की, तुम्ही आहांतच मर्यादेच्या बाहेर जाणारे [२] १६६

قَالُوا لَئِنْ لَمْ تَنْتَهِ يَا لُوطُ لَتَكُونَنَّ مِنَ الْمُخْرَجِينَ ﴿١٦٧﴾

त्यांनी उत्तर दिले की, हे लूता! जर तू (यापासून) परावृत्त झाला नाहीस, तर खचित्‌च (बाहेर) काढून दिला जाशील [३] १६७

قَالَ إِنِّي لِعَمَلِكُمْ مِنَ الْقَالِينَ ﴿١٦٨﴾

त्यांनी सांगितले, मी तुमच्या (या) कामाने फारच नाखुष आहे. [४] १६८

رَبِّ نَجِّنِي وَأَهْلِي مِمَّا يَعْمَلُونَ ﴿١٦٩﴾

हे माझ्या पालनकर्त्या! मला आणि माझ्या घराण्याला, या ओंगळ कामापासून वांचवून घे; जे हे करीत आहे. १६९

فَنَجَّيْنَاهُ وَأَهْلَهُ أَجْمَعِينَ ﴿١٧٠﴾

मग आम्ही त्याला आणि त्याच्या कुटूंबाला, सर्वांना वांचवून घेतले १७०

إِلَّا عَجُوزًا فِي الْغَابِرِينَ ﴿١٧١﴾

एका म्हातारीशिवाय की, ती मागे राहून जाणाऱ्यांमध्ये होऊन गेली [५] १७१

ثُمَّ دَمَّرْنَا الْآخَرِينَ ﴿١٧٢﴾

मग आम्ही बाकी सर्व लोकांना नष्ट करून टाकले १७२

وَأَمْطَرْنَا عَلَيْهِمْ مَطَرًا ۖ فَسَاءَ مَطَرُ الْمُنْذَرِينَ ﴿١٧٣﴾

आणि आम्ही त्यांच्यावर एक खास प्रकारची वर्षा केली; ती फारच वाईट वर्षा होती, जी भिवविण्यात आलेल्या लोकांवर वर्षविण्यांत आली [६] १७३

إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَةً ۖ وَمَا كَانَ أَكْثَرُهُمْ مُؤْمِنِينَ ﴿١٧٤﴾

नि:संशय हा वृत्तांत पण निव्वळ एक धडा आहे; त्यांच्यातून पण बहुतेक मुसलमान नव्हते १७४

९/१६/१३

وَإِنَّ رَبَّكَ لَهُوَ الْعَزِيزُ الرَّحِيمُ ﴿١٧٥﴾

आणि नि:संशय तुझा पालनकर्ता तोच आहे सामर्थ्यवान आणि दयाळू १७५

كَذَّبَ أَصْحَابُ لَئْيْكَةِ الْمُرْسَلِينَ ﴿١٧٦﴾

'ऐका' [७] वाल्यांनी पण पैगंबरांना खोटे ठरवले. १७६

إِذْ قَالَ لَهُمْ شُعَيْبٌ أَلَا تَتَّقُونَ ﴿١٧٧﴾

जेव्हा की त्यांना 'शोएब' ने सांगितले की काय तुम्हाला भय वाटत नाही? १७७

إِنِّي لَكُمْ رَسُولٌ أَمِينٌ ﴿١٧٨﴾

मी तुमच्याकडे एक प्रामाणिक पैगंबर आहे. १७८

فَاتَّقُوا اللَّهَ وَأَطِيعُونِ ﴿١٧٩﴾

तर तुम्ही अल्लाहचे भय बाळगा, आणि माझे आज्ञापालन करा १७९

وَمَا أَسْأَلُكُمْ عَلَيْهِ مِنْ أَجْرٍ ۖ إِنْ أَجْرِيَ إِلَّا عَلَىٰ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿١٨٠﴾

आणि मी याच्यावर तुमच्याकडून काही मोबदला इच्छित नाही; माझा मोबदला सकल जगाच्या पालनकर्त्याकडे आहे १८०

أَوْفُوا الْكَيْلَ وَلَا تَكُونُوا مِنَ الْمُخْسِرِينَ ﴿١٨١﴾

माप पूर्ण भरीत जा; कमी देणाऱ्यांमध्ये शामील होऊ नका [८] १८१

وَزِنُوا بِالْقِسْطَاسِ الْمُسْتَقِيمِ ﴿١٨٢﴾

आणि सरळ, बरोबर तराजूने तोलत जा; [९] १८२

وَلَا تَبْخَسُوا النَّاسَ أَشْيَاءَهُمْ وَلَا تَعْثَوْا فِي الْأَرْضِ مُفْسِدِينَ ﴿١٨٣﴾

आणि लोकांना त्यांच्या वस्तू कमी देऊ नका; [१०] आणि निर्लज्जपणे मुलुखात फिसाद फैलावित फिरू नका. [११] १८३

وَاتَّقُوا الَّذِي خَلَقَكُمْ وَالْجِبِلَّةَ الْأَوَّلِينَ ﴿١٨٤﴾

आणि त्या अल्लाहचे भय बाळगा; ज्याने स्वत: तुम्हास आणि तुमच्या पूर्वीच्या सृष्टीला [१२] निर्माण केले आहे १८४

१) ही लूतच्या लोकांची सर्वांत वाईट सवय होती. ज्याची सुरवात, याच लोकांपासून झाली होती. म्हणूनच या कुकर्माला 'लवातत' असे संबोधण्यात येते. म्हणजे ते कुकर्म ज्याची सुरवात, लूतच्या लोकांकडून झाली; परंतु आता हे कुकर्म, सर्व जगात सर्रास आढळून येते. किंबहुना युरोपमध्ये तर त्याला, कायद्याने मान्य करून घेण्यात आले आहे. म्हणजे यांच्याजवळ मुळांतच हा गुन्हाच नाही. ज्या समाजाचा आचार

विचार इतका बिघडून गेला असेल की, पुरूष आणि स्त्रीचा अयोग्य शरीर संबंध, (या अटीवर की, आपसातल्या खुषीने असेल) त्यांच्या जवळ अपराध नसेल, तर तेथे, दोन पुरूषांचे आपसांत कुकर्म करणे, कांम्हणून गुन्हा आणि अयोग्य, होऊं शकते? अआज नल्लाहु मिनहु!

२) 'आदून' 'आदी' चे अनेकवचन आहे. अरबीत 'आदी' चा अर्थ आहे मर्यादेच्या बाहेर जाणारा. म्हणजे सत्त्याला सोडून असत्त्याला, हलाल सोडून हरामला अंगीकारणारा. अल्लाहतआलाने, कायदेशीर लग्नाच्या मार्फत, स्त्रीच्या, जननेंद्रियाकडून, आपल्या कामेच्छेला तृप्त करणे, हलाल ठरविले आहे; आणि या कामासाठी, पुरूषाच्या (ढुंगणाला) पार्श्वभागाला हराम. लूतच्या लोकांनी, स्त्रीयांच्या जननेंद्रियांना सोडून, पुरूषांच्या पार्श्वभागाला या कामासाठी उपयोगात आणला. आणि अशाप्रकारे त्यांनी मर्यादेचे उल्लंघन केले.

३) म्हणजे ह.लूत عليه السلام च्या उपदेशाच्या उत्तरांत, त्यांनी सांगितले की तू मोठा पवित्र बनून फिरत आहे. लक्षात ठेव! जर तू यापासून परावृत्त झाला नाहीस, तर आम्ही तुला आपल्या वस्तीत राहूच देणार नाही. आजपण कुकर्मांचे एवढे प्राबल्य आणि कुकर्मींचा एवढा जोर आहे की, पुण्य, तोंड लपवीत फिरत आहे आणि पुण्यवान लोकांकरीतां, जीवनाचे मैदान तंग करून देण्यांत आले आहे.

४) म्हणजे मी याला पसंत करीत नाही; आणि यापासून फार अलिप्त आहे.

५) याच्याने अभिप्रेत,ह.लूत عليه السلام ची म्हातारी पत्नी आहे; जी मुसलमान झाली नव्हती. तात्पर्य, ती पण आपल्या लोकांबरोबर नष्ट करून देण्यांत आली.

६)म्हणजे निशाण्या लावलेल्या दगडांच्या वर्षावाने आम्ही त्यांना ठार करुन टाकले आणि त्यांच्या वस्त्यांना त्यांच्यावर उलटवून देण्यात आल्या. (सू.हूद ८२/८३)

७)'ऐका' जंगलाला म्हणतात. याच्याने ह.शोएब عليه السلام चे लोक आणि वस्तीत-मदयनच्या आजुबाजूचे रहिवाशी अभिप्रेत आहेत. आणि सांगण्यांत येते की, 'ऐका' चा अर्थ आहे घनदाट वृक्ष. आणि असा एक वृक्ष मदयनच्या बंदिस्त वसाहतीत होता. ज्याची पूजा अर्चा होत असे. ह.शोएब عليه السلام चे पैगंबरीचे क्षेत्र आणि निमंत्रण आणि प्रचाराची हद्द त्या बंदिस्त वस्तीपर्यंत होती. जेथे 'ऐका' वृक्षाची पुजा होत असे. तेथील रहिवाशांना 'अस्हाबुल ऐका' संबोधण्यास आले आहे. या अनुषंगाने 'अस्हाबुल ऐका' आणि मदयनवाले यांचे पैगंबर एकच म्हणजे ह.शोएब عليه السلام होते. आणि ही एकाच पैगंबराची उम्मत होती. 'ऐका' कारण की, समाज नाही किंबहुना एक वृक्ष होता, म्हणून येथे भाऊ असण्याचा उल्लेख केला नाही; ज्याप्रमाणे दुसऱ्या पैगंबरांच्या उल्लेखांत आहे. तथापि, जेथे मदयनच्या संदर्भात, ह.शोएब عليه السلام चे नांव घेण्यांत आले आहे, तेथे त्यांचा भाऊबंद होण्याचा उल्लेखपण आढळून येतो, कारण की, मदयन एका समाजाचे नांव आहे. ''व इला मदयन अखाहुम शोएबा'' (सू.अअराफ-८५) काही भाष्यकारांनी, अस्हाबुल ऐका आणि मदयनला वेगवेगळ्या वस्त्या ठरवून म्हटले आहे की, या वेगवेगळ्या दोन उम्मती आहेत. ज्यांच्याकडे पाळी पाळीने ह.शोएब عليه السلام ला पाठविण्यात आले, एका वेळेला अस्हाबुल ऐकाकडे, आणि एका वेळा मदयनकडे. परंतु इमाम इब्ने कसीर म्हणतात की, खरी गोष्ट हीच आहे की, ही एकच उम्मत आहे. ''अवफुल कैल वल् मिजान'' चा जो उपदेश, मदयनवाल्यांना केला गेला, हाच उपदेश येथे अस्हाबुल ऐकाला केला जात आहे. ज्याच्याने स्पष्ट जाहीर आहे की, ही एकच उम्मत आहे, दोन नाहीत.

८) म्हणजे जेव्हा तुम्ही लोकांना मापून द्याल, तर अशाच प्रकारे पूर्ण द्या; ज्याप्रमाणे घेते वेळेस तुम्ही पूर्ण मापून घेतात. घेण्या आणि देण्याची मापे वेगवेगळी ठेऊं नका. की देतांना कमी द्यावे आणि घेतांना पूर्ण घ्यावे!

९) अशाच प्रकारे तोलतांना दांडी मारू नका. किंबहुना पूर्ण बरोबर तोल करून द्या!

१०) म्हणजे लोकांना देतांना मापांत, किंवा तोलात कमी करू नका.

११) म्हणजे अल्लाहचा आज्ञाभंग करू नका. याच्याने मुलुखात फसाद फैलतो. काहींनी याच्याने अभिप्रेत, ती वाटमारी घेतली आहे, जे काम पण हा समाज करीत होता. जसे की, दुसऱ्या ठिकाणी आहे, ''रस्त्यांमध्ये लोकांना भिवविण्याकरीता बसू नका.'' (सू.अअ्राफ-८६) (इब्ने कसीर)

१२) 'जिबिल्लतून' आणि 'जिबील्ल' सृष्टीच्या अर्थांत आहे. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी शैतानाच्या बाबतीत सांगितले, ''याने पुष्कळशा सृष्टीला बहकविले.'' (सू.यासीन=६२) याचा उपयोग मोठ्या समूहासाठी होतो.

قَالُوٓا اِنَّمَآ اَنۡتَ مِنَ الۡمُسَحَّرِيۡنَ ۙ﴿۱۸۵﴾

**त्यांनी म्हटले की तू तर त्यांच्यातून आहेस, ज्यांच्यावर जादू करून देण्यात येतो (१८५)**

وَمَآ اَنۡتَ اِلَّا بَشَرٌ مِّثۡلُنَا وَاِنۡ نَّظُنُّكَ لَمِنَ الۡكٰذِبِيۡنَ ۚ﴿۱۸۶﴾

**आणि तू तर आमच्याच सारखा एक मनुष्य आहे; आणि आम्ही तर तुला खोटे बोलणाऱ्यांमधूनच समजत आहोत[1] (१८६)**

فَاَسۡقِطۡ عَلَيۡنَا كِسَفًا مِّنَ السَّمَآءِ اِنۡ كُنۡتَ مِنَ الصّٰدِقِيۡنَ ؕ﴿۱۸۷﴾

**जर तू खऱ्या लोकांपैकी आहेस, तर आमच्यावर आकाशाचा कोणी तुकडा पाडून दे[2] (१८७)**

قَالَ رَبِّىۡۤ اَعۡلَمُ بِمَا تَعۡمَلُوۡنَ ﴿۱۸۸﴾

**(शोएबने) म्हटले की माझा पालनकर्ता खूप जाणणारा आहे, जे काही तुम्ही करीत आहांत[3] (१८८)**

فَكَذَّبُوۡهُ فَاَخَذَهُمۡ عَذَابُ يَوۡمِ الظُّلَّةِ ؕ اِنَّهٗ كَانَ عَذَابَ يَوۡمٍ عَظِيۡمٍ ﴿۱۸۹﴾

**कारण की त्यांनी त्याला खोटे ठरवले, तर त्यांना सावलीच्या दिवशी शिक्षेने त्यांना पकडून घेतले;[4] ती मोठ्या भारी दिवसाची शिक्षा होती (१८९)**

اِنَّ فِىۡ ذٰ لِكَ لَاٰيَةً ؕ وَمَا كَانَ اَكۡثَرُهُمۡ مُّؤۡمِنِيۡنَ ﴿۱۹۰﴾

**खचित्च याच्यांत मोठी निशाणी आहे; आणि यांच्यातून बहुतेक लोक मुसलमान नव्हते (१९०)**

وَاِنَّ رَبَّكَ لَهُوَ الۡعَزِيۡزُ الرَّحِيۡمُ ﴿۱۹۱﴾

**आणि खचित्च तुझा पालनकर्ता अलबत तोच आहे. सामर्थ्यवान आणि दयानिधी (१९१)**

وَاِنَّهٗ لَتَنۡزِيۡلُ رَبِّ الۡعٰلَمِيۡنَ ؕ﴿۱۹۲﴾

**आणि याच्यांत काही शंका नाही, हे (कुरआन,) सकल जगांच्या पालनकर्त्याकडून अवतरीत झाले आहे (१९२)**

نَزَلَ بِهِ الرُّوۡحُ الۡاَمِيۡنُ ۙ﴿۱۹۳﴾

**याला प्रामाणिक देवदूत घेऊन आला आहे.[5] (१९३)**

१) म्हणजे जो दावा करीतो की मला अल्लाहने वह्य आणि पैगंबरी प्रदान केले आहे. आम्ही तुला या दाव्यात खोटे समजतो; कारण की तू पण आमच्याच सारखा एक मनुष्य आहेस. मग तू या प्रतिष्ठेने, प्रतिष्ठीत का म्हणून होऊ शकतो?

२) हे ह.शोएब عليه السلام च्या तंबीवर उत्तर म्हणून त्यांनी सांगितले की जर तू खरोखर सच्चा आहेस, तर जा! आम्ही तुला मानत नाही, आमच्यावर आकाशाचा तुकडा पाडून दाखव!

३) म्हणजे तुम्ही जे कुफ्र शिर्क करीत आहात, अल्लाह सर्व जाणतो. आणि तोच याचा बदला तुम्हास देईन. जर इच्छील तर, जगांत पण देऊन देईल. ही शिक्षा किंवा सजा त्याच्या अखत्यारीत आहे.

४) त्यांनी पण मक्केच्या काफिरांप्रमाणे, आकाशी शिक्षा मागितली होती; अल्लाहने त्याच्याप्रमाणे शिक्षा पाठवून दिली; आणि ते अशाप्रकारे की काही रिवायतीनुसार, सात दिवसांपर्यंत, त्यांच्यावर कडक उष्णता आणि उन अवतरीत करून दिले. आणि याच्यानंतर ढगांची एक सांवली आली; आणि हे सर्व त्या उष्णता आणि उन्हांच्या तिव्रतेपासून वाचण्यासाठी, त्या सावलीखाली जमा होऊन गेले. आणि काही समाधान पावले; परंतु थोड्याच क्षणानंतर, आकाशांतून आगीचे अंगारे वर्षवण्यांस सुरूवांत झाली; पृथ्वी भूकंपाने थरथर कापू लागली; आणि एका तीव्र गर्जनेने, त्यांना नेहमीकरीता, मृत्युच्या झोपेने, झोपवून दिले. अशा प्रकारे तीन प्रकारची शिक्षा त्यांच्यावर आली. आणि हे त्या दिवशी झाले, ज्या दिवशी त्यांच्यावर ढगाने सावली केली. यासाठी म्हटले की, सांवलीवाल्या दिवसाच्या शिक्षेने, त्यांना पकडून घेतले.
इमाम इब्ने कसीर म्हणतात, अल्लाहतआलाने तीन जागी, शोएब عليه السلام च्या लोकांचा नष्ट होण्याचा उल्लेख केला आहे. आणि तिन्ही ठिकाणी, प्रसंगानुरूप वेगवेगळ्या शिक्षेचा उल्लेख केला आहे. सू.आअराफ-८८ मध्ये भूकंपाचा उल्लेख आहे, सू.हूद-९४मध्ये, गर्जनेचा आणि येथे सू.शूअरामध्ये, आकाशातून तुकडे पाडण्याचा. म्हणजे तीन प्रकारची शिक्षा या लोकांवर आली.

५) मक्केच्या काफिरांनी, कुरआनाला अल्लाहचे वह्य होण्याला, आणि ते अल्लाहकडून अवतरीत होण्याला नाकारले; आणि याच आधारावर मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीला, आणि त्यांच्या ﷺ आमंत्रणाला नाकारले. अल्लाहतआलाने पैगंबर लोकांच्या घटना वर्णन करून, हे स्पष्ट केले की, हे कुरआन खचित्च अल्लाहचे वह्य आहे; आणि मुहम्मद ﷺ अल्लाहचे खरे पैगंबर आहेत. कारण की, जर असे नसते, तर हा पैगंबर जो वाचू शकत नाही, आणि लिहू शकत नाही; मागील पैगंबर आणि समाजांच्या घटना, कशा प्रकारे वर्णन करू शकला असता? म्हणून हे कुरआन खचित्च अल्लाह, सकल जगाच्या पालनकर्त्याकडून अवतरीत झाले आहे; ज्याला एक प्रमाणिक देवदूत, म्हणजे जिब्रईल عليه السلام घेऊन आले.

عَلٰى قَلْبِكَ لِتَكُوْنَ مِنَ الْمُنْذِرِيْنَ ﴿١٩٤﴾

**आपल्या अंत:करणावर उतारले आहे, [१] की आपण सावध करून देणाऱ्यांमध्ये होऊन जावे [२] (१९४)**

بِلِسَانٍ عَرَبِيٍّ مُّبِيْنٍ ﴿١٩٥﴾

**स्वच्छ अरबी भाषेत आहे (१९५)**

وَاِنَّهٗ لَفِيْ زُبُرِ الْاَوَّلِيْنَ ﴿١٩٦﴾

**आणि पूर्वीच्या पैगंबरांच्या पुस्तकांत सुद्धा, या कुरआनाचा मजकूर आहे. [३] (१९६)**

اَوَلَمْ يَكُنْ لَّهُمْ اٰيَةً اَنْ يَّعْلَمَهٗ عُلَمٰٓؤُا بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ ﴿١٩٧﴾

**काय त्यांना ही निशाणी पुरेशी नाही, की, कुरआनाच्या सत्यतेला, बनी इस्राईलचे धर्मपंडीत पण जाणतात [४] (१९७)**

وَلَوْ نَزَّلْنٰهُ عَلٰى بَعْضِ الْاَعْجَمِيْنَ ﴿١٩٨﴾

**आणि जर आम्ही त्याला कोण्या परकीय माणसावर अवतरीत करतो; (१९८)**

فَقَرَاَهٗ عَلَيْهِمْ مَّا كَانُوْا بِهٖ مُؤْمِنِيْنَ ﴿١٩٩﴾

**मग तो यांच्यासमोर याचे वाचन करीता तर हे लोक त्यावर ईमान आणणारे झाले नसते. [५] (१९९)**

كَذٰلِكَ سَلَكْنٰهُ فِيْ قُلُوْبِ الْمُجْرِمِيْنَ ﴿٢٠٠﴾

**अशाचप्रकारे आम्ही गुन्हेगारांच्या अंत:करणांत या नाकारण्याला, दाखल करून दिले आहे; [६] (२००)**

لَا يُؤْمِنُوْنَ بِهٖ حَتّٰى يَرَوُا الْعَذَابَ الْاَلِيْمَ ﴿٢٠١﴾

**ते जोपर्यंत यातनादायक शिक्षा पाहून घेणार नाहीत, ईमान आणणार नाहीत (२०१)**

فَيَاْتِيَهُمْ بَغْتَةً وَّهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ﴿٢٠٢﴾

**तर ती शिक्षा अचानक येऊन ठेपेल आणि त्यांना तिची काही जाण असणार नाही (२०२)**

فَيَقُوْلُوْا هَلْ نَحْنُ مُنْظَرُوْنَ ﴿٢٠٣﴾

**त्यावेळी म्हणतील की, काय आम्हांस काही अवकाश दिला जाईल? [७] (२०३)**

اَفَبِعَذَابِنَا يَسْتَعْجِلُوْنَ ﴿٢٠٤﴾

**तर काय हे आमच्या शिक्षेसाठी घाई मचवित आहे? [८] (२०४)**

اَفَرَءَيْتَ اِنْ مَّتَّعْنٰهُمْ سِنِيْنَ ﴿٢٠٥﴾

**बरे! हे तर सांगा की, जर आम्ही त्यांना कित्येक वर्षे पण फायदा उचलू दिला; (२०५)**

१) अंत:करणाचा विशेष करून यासाठी उल्लेख केला की, मनाच्या आंतरभावात अंत:करणच सर्वांत जास्त, स्मरणांत ठेवण्याची व पाठ करण्याचे सामर्थ्य बाळगते.

२) हे कुरआनाच्या अवतरीत होण्याचे कारण आहे.

३) म्हणजे ज्याप्रमाणे शेवटच्या काळांतील पैगंबर ﷺ च्या जाहीर होण्याचा आणि आपण ﷺ च्या सद्गुणांच्या विशेषणांची चर्चा मागील आकाशी ग्रंथांत आहे, त्याचप्रमाणे या कुरआनाच्या अवतरणाची शुभवार्ता पण पूर्वीच्या धर्मग्रंथामध्ये दिली गेली होती. एक दुसरा अर्थ हा केला गेला आहे की, हे कुरआन मजीदच्या त्या आदेशांच्या अनुषंगाने, ज्यावर सर्व धर्मशास्त्राची एकवाक्यता राहिली आहे, मागील पुस्तकांत पण आढळून येतात.

४) कारण की या पुस्तकामध्ये, आपण ﷺ चा आणि कुरआनाचा उल्लेख आढळून येतो. हे मक्केचे काफिर, धार्मिक मामल्यांत, यहुद्यांकडे वळत असत. या अनुषंगाने सांगितले की, काय यांचे हे जाणणे आणि दाखविणे, या गोष्टीचे प्रमाण नाही की, मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, अल्लाहचे खरे पैगंबर आणि हे कुरआन, अल्लाहकडून अवतरीत झालेले आहे. मग हे यहुद्यांच्या या गोष्टीला मान्य करीत, पैगंबरावर ईमान कांआणित नाही?

५) म्हणजे जर कोण्या परकीय भाषेत अवतरीत करतो, तर हे म्हणाले असते की, हे तर आमच्या लक्षांत येत नाही; जसे हा-मीम-सजदा-४४ मध्ये आहे.

६) म्हणजे 'सलकनाहू' मध्ये जमीर चा मर्जा, कुफ्र आणि पाखंड, व जाणून बुजून नाकारणे आणि हट्टधर्मी आहे.

७) परंतु शिक्षा प्रत्यक्ष पाहून घेतल्यानंतर, अवकाश दिला जात नाही. तसेच या वेळचा पश्चात्ताप पण मान्य नाही. ''परंतु आमची शिक्षा सादर झाल्यानंतर, त्यांच्या ईमानाने त्यांना काही फायदा पोहचविला नाही'' (सू. अल् मोमिन-८५)

८) हा इशारा आहे, त्यांच्या या मागणीकडे, जे आपल्या पैगंबराकडे ते करीत राहिले आहेत. की जर तू खरा आहेस तर शिक्षा घेऊन ये!

ثُمَّ جَآءَهُمْ مَّا كَانُوْا يُوْعَدُوْنَ ﴿٢٠٦﴾
मग त्यांना त्या शिक्षेने येऊन गांठले, ज्यापासून यांना धमकविण्यात येत होते; (२०६)

مَآ اَغْنٰى عَنْهُمْ مَّا كَانُوْا يُمَتَّعُوْنَ ﴿٢٠٧﴾
तर जो काही पण सुखोपभोग हे घेत राहिले, यापासून यांना काही पण फायदा पोहचू शकणार नाही.[1] (२०७)

وَمَآ اَهْلَكْنَا مِنْ قَرْيَةٍ اِلَّا لَهَا مُنْذِرُوْنَ ﴿٢٠٨﴾
आणि आम्ही कोणत्याही वस्तीला नष्ट केले नाही या स्थितीत की, तिच्याकरता भिवविणारे होते (२०८)

ذِكْرٰى ۛ وَمَا كُنَّا ظٰلِمِيْنَ ﴿٢٠٩﴾
उपदेश म्हणून; आणि आम्ही जुलूम करणारे नाही[2] (२०९)

وَمَا تَنَزَّلَتْ بِهِ الشَّيٰطِيْنُ ﴿٢١٠﴾
आणि या कुरआनाला शैतानांनी आणले नाही (२१०)

وَمَا يَنْۢبَغِيْ لَهُمْ وَمَا يَسْتَطِيْعُوْنَ ﴿٢١١﴾
आणि न हे त्यांच्यासाठी योग्य आहे, आणि न त्यांना याचे सामर्थ्य आहे (२११)

اِنَّهُمْ عَنِ السَّمْعِ لَمَعْزُوْلُوْنَ ﴿٢١٢﴾
किंबहुना ते तर (याला) ऐकण्यापासून सुद्धा वंचित् करून दिले गेले आहेत[3] (२१२)

فَلَا تَدْعُ مَعَ اللّٰهِ اِلٰهًا اٰخَرَ فَتَكُوْنَ مِنَ الْمُعَذَّبِيْنَ ﴿٢١٣﴾
तर तू अल्लाहशिवाय आणखी कोण्या उपास्यास बोलावू नकोस की, तू पण शिक्षेस पात्र होऊन जावा (२१३)

وَاَنْذِرْ عَشِيْرَتَكَ الْاَقْرَبِيْنَ ﴿٢١٤﴾
आणि आपल्या जवळच्या नातेवाईकांना, भीती दाखव[4] (२१४)

وَاخْفِضْ جَنَاحَكَ لِمَنِ اتَّبَعَكَ مِنَ الْمُؤْمِنِيْنَ ﴿٢١٥﴾
आणि त्यांच्याशी नम्रतेने वाग; की जो कोणी ईमान आणणारा असून, तुझे आज्ञापालन करेल (२१५)

فَاِنْ عَصَوْكَ فَقُلْ اِنِّيْ بَرِيْٓءٌ مِّمَّا تَعْمَلُوْنَ ﴿٢١٦﴾
जर हे लोक तुझा आज्ञाभंग करतील, तर तू जाहीर करून टाक, की मी त्या कामांपासून अलिप्त आहे, जे तुम्ही करीत आहांत (२१६)

وَتَوَكَّلْ عَلَى الْعَزِيْزِ الرَّحِيْمِ ﴿٢١٧﴾
आणि आपला पूर्ण विश्वास, सामर्थ्यवान, दयाळू अल्लाहवर ठेव (२१७)

الَّذِيْ يَرٰىكَ حِيْنَ تَقُوْمُ ﴿٢١٨﴾
जो तुला पाहत असतो जेव्हांकी तू (त्याच्यासमोर) उभा रहातो (२१८)

وَتَقَلُّبَكَ فِي السّٰجِدِيْنَ ﴿٢١٩﴾
आणि सजदा करणाऱ्यांमध्ये, तुझे चालणे फिरणे सुद्धा[5] (२१९)

اِنَّهٗ هُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٢٢٠﴾
तो खूप ऐकणारा आणि जाणणारा आहे. (२२०)

هَلْ اُنَبِّئُكُمْ عَلٰى مَنْ تَنَزَّلُ الشَّيٰطِيْنُ ﴿٢٢١﴾
काय मी तुम्हांस सांगू की, शैतान कोणावर उतरतात? (२२१)

تَنَزَّلُ عَلٰى كُلِّ اَفَّاكٍ اَثِيْمٍ ﴿٢٢٢﴾
ते प्रत्येक खोटारड्या गुन्हेगारावर उतरतात[6] (२२२)

يُّلْقُوْنَ السَّمْعَ وَاَكْثَرُهُمْ كٰذِبُوْنَ ﴿٢٢٣﴾
कर्णोपकर्णी ऐकलेल्या गोष्टी पोहचवूंन देतात; आणि यांच्यातून बहुतेक लबाड असतात.[7] (२२३)

وَالشُّعَرَآءُ يَتَّبِعُهُمُ الْغَاوٗنَ ﴿٢٢٤﴾
आणि कवींचे अनुकरण तेच करतात, जे बहकलेले असतील (२२४)

اَلَمْ تَرَ اَنَّهُمْ فِيْ كُلِّ وَادٍ يَّهِيْمُوْنَ ﴿٢٢٥﴾
काय आपण त्यांना पाहिले, की कवी लोक हरेक काल्पनिक गोष्टींच्या जंगलात, हैराण होऊन भटकतात (२२५)

وَاَنَّهُمْ يَقُوْلُوْنَ مَا لَا يَفْعَلُوْنَ ﴿٢٢٦﴾
आणि ते जे काही म्हणतातकरीत नाहीत[8] (२२६)

१) म्हणजे जर आम्ही त्यांना सवलत देऊन दिली; मग पुन्हा त्यांना आपल्या शिक्षेत पकडून घेऊ, तर काय ऐहिक द्रव्य आणि संपत्ती, त्यांच्या काही कामा येईल? म्हणजे त्यांना शिक्षेपासून वांचवू शकेल? खचित्‌च नाही.

''म्हणजे जणू हे आयुष्य वाढवून देणे पण त्यांना शिक्षेपासून वांचवू शकत नाही.'' (सू.बकर:-९६) ''त्याची धन दौलत, त्याला पालथा पाडण्याच्या वेळेस, काही कामा येणार नाही'' (सू.लैल-११)

२) म्हणजे पैगंबर पाठविणे आणि भिवविण्याशिवाय, जर आम्ही कोण्या वस्तीला नष्ट करून टाकले असते, तर हा

जुलूम झाला असता; आम्ही असा जुलूम केला नाही. किंबहुना न्यायाच्या मागणीनुसार, आम्ही प्रथम, प्रत्येक वस्तीत पैगंबर पाठविले, ज्यांनी वस्तीवाल्यांना, अल्लाहच्या शिक्षेकडून भिवविले. आणि याच्यानंतर, जेव्हा त्यांनी पैगंबराची गोष्ट मान्य केली नाही, तेव्हा आम्ही त्यांना नष्ट करून टाकले. हाच विषय, सू.बनी इस्राईल-१५ आणि सू.कसस-५९ वगैरे मध्ये पण वर्णन करण्यात आला आहे.

३) या महावाक्यांमध्ये, कुरआनाचे शैतानी हस्तक्षेपापासून, संरक्षणाचे वर्णन आहे. एक तर यासाठी की, शैतानांचे, कुरआन घेऊन अवतरीत होणे, त्यांच्या योग्य नाही. कारण की, त्यांचा उद्देश्य, खोडसाळपणा आणि फसाद, आणि ज्यापासून मना केले जाते, त्यांची जाहिरात करणे, हा असतो; जेव्हांकी, कुरआनाचा उद्देश्य, चांगली कामे करण्याचा हुकूम आणि प्रकाश देणे, आणि वाईट कामांपासून मना करणे, हा आहे. जणू दोन्ही एक दुसऱ्याच्या विरुद्ध आहेत. दुसरे असे की, शैतान याचे सामर्थ्यपण बाळगीत नाहीत. तिसरे, कुरआनाच्या अवतरीत करणाच्या वेळेस, शैतान याच्या ऐकण्यापासून दूर, आणि वंचित् ठेवण्यात आलेत. आकाशांवर ताऱ्यांना पहारेकरी बनवून देण्यात आले. आणि जोपण शैतान वर जाई, हे तारे त्याच्यावर उल्कापात बनून पडत, आणि त्यांना भस्म करून टाकीत. अशा प्रकारे अल्लाहतआलाने, कुरआनाला शैतानांपासून वाचविण्याची विशेष व्यवस्था केली.

४) पैगंबराचे आमंत्रण फक्त नातेवाईकांसाठी नाही, किंबहुना संपूर्ण समाजासाठी असते. आणि नबी ﷺ तर, संपूर्ण मानव वंशासाठी, हिदायत करणारे आणि मार्गदर्शक बनून आले होते. जवळच्या नातेवाईकांना, ईमानाचे आमंत्रण, संपूर्ण जगताच्या आमंत्रणाच्या विरुद्ध नाही; किंबहुना याचाच एक भाग, किंवा याचा एक श्रेष्ठ पक्ष आहे. ज्याप्रमाणे ह.इब्राहीम عليه السلام नी सुद्धा, सर्वांत प्रथम, आपले वडील 'आजर' ला एकेश्वरवादाचे आमंत्रण दिले होते. या हुकुमानंतर, नबी ﷺ 'सफा' डोंगरावर चढून गेले, आणि 'या सबाहा' ! म्हणून आवाज दिला. हे शब्द त्या वेळी बोलले जातात, जेव्हा शत्रू अचानक हल्ला करून देई, याच्या मार्फत लोकांना सावध करून देण्यांत येत असे. हे शब्द ऐकून लोक जमा होऊन गेले. आपण ﷺ नी कुरैशच्या वेगवेगळ्या घराण्यांची नांवे घेऊन सांगितले, ''सांगा! जर मी तुम्हास, असे सांगीन की, या डोंगराच्या पाठीमागे, शत्रुचे सैन्य उपस्थित आहे, जे तुमच्यावर हल्ला करू इच्छितात, तर काय तुम्ही मान्य कराल?'' सगळ्यांनी सांगितले होय ' आम्ही मान्य करू! आपण तर 'अमीन आणि सादिक आहात. आम्ही आपणांस कधी खोटे बोलतांना पाहिले नाही. आपण ﷺ नी फर्माविल की, मला अल्लाहने भिवविणारा बनवून पाठविले आहे. मी तुम्हास एका कडक शिक्षेकडून भिववितो, यावर अबुलहबने म्हटले, तुझा नाश होवो! काय तू आम्हांस यासाठी बोलाविले होते? याच्या उत्तरांत, 'सुरतुल तब्बतयदा' अवतीर्ण झाला. (स.बुखारी तफसीर सू.लहाब) आपण ﷺ नी आपली मुलगी फातमा رضي الله عنها आणि आपली आत्त्या ह.सफिया رضي الله عنها ला पण सांगितले, तुम्ही अल्लाहजवळ आपल्या बचावाचा बंदोबस्त करून घ्या ! मी तेथे तुमच्या काही कामा येऊ शकणार नाही. (स.मुस्लिम)

५) म्हणजे जेव्हा तू एकटा असतोस, तेव्हा पण अल्लाह तुला पाहतो. आणि जेव्हा लोकांमध्ये असतो, तेव्हा पण.

६) म्हणजे या कुरआनाच्या अवतरणामध्ये, शैतानाचा काही हस्तक्षेप नाही. कारण की, शैतान तर लबाड व गुन्हेगार (म्हणजे मांत्रिक, ज्योतिषी वगैरे) यांच्यावर उतरतात; न की, पैगंबर आणि सदाचरणी लोकांवर

७) म्हणजे एखादी गोष्ट, जी कोण्याप्रकारे ऐकण्यांत ते यशस्वी होऊन जातात, या मांत्रिकांना येऊन सांगून देतात. ज्याच्याबरोबर ते शंभर खोट्या गोष्टी, आणखी मिसळून देतात. (जसे की सहीह हदीसमध्ये आहे. कृपया पहावे स.बुखारी,स.मुस्लिम) शैतान, आकाशांतून ऐकलेल्या काही गोष्टी, मांत्रिकांना पोहचवूंन देतात; या स्वरूपांत समअचा अर्थ ऐकले गेलेले चा होईल. पण जर याचा अर्थ कान आहे तर भावार्थ होईल, शैतान आकाशावर जाऊन, कान लावून, चोरून लपून काही गोष्टी ऐकून येतात. आणि मग त्यांना मांत्रिकांपर्यंत पोहचवून देतात.

८) कवींची बहुतेकता, कारण की, अशी असते की, ते स्तुती आणि निंदेत तत्त्व आणि कायद्याच्या ऐवजी, वैयक्तिक आवड आणि नावडच्या प्रमाणे, मताचे प्रदर्शन करीत असतात. याशिवाय याच्यामध्ये मर्यादेच्या पलिकडे जाणे, आणि अतिशोक्तीने काम घेतात; आणि कवीत्वाच्या कल्पनेत, कधी इकडे तर कधी तिकडे भटकत असतात. म्हणून सांगितले की यांच्यामागे लागलेले सुद्धा बहकलेले आहेत. याच प्रकारच्या काव्यांकरीता हदीसमध्ये सुद्धा सांगण्यात आले आहे की, ''पोटाला रक्त आणि पुंवा ने भरून घेणे, जे त्याला खराब करून टाकेल, काव्याने भरून घेण्यापेक्षा उत्तम आहे.'' (तिर्मीझी, स.मुस्लीम) येथे हे सांगण्याचा उद्देश्य हा आहे की, आमचा पैगंबर न मांत्रिक आहे, न कवी. यासाठी की हे दोघेपण लबाड आहेत. तथापि दुसऱ्या ठिकाणी सुद्धा, आपण ﷺ कवी असल्याचे नाकारण्यांत आले आहे. उदाहरणार्थ सू.यासीन-६९ सू.हाक्का-४०/४३

إِلَّا الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ وَذَكَرُوا اللَّهَ كَثِيرًا وَانتَصَرُوا مِن بَعْدِ مَا ظُلِمُوا ۗ وَسَيَعْلَمُ الَّذِينَ ظَلَمُوا أَيَّ مُنقَلَبٍ يَنقَلِبُونَ ﴿٢٢٧﴾ ع ١١ ٣٦ ١٥

त्यांच्याशिवाय, [१] ज्यांनी ईमान आणले; आणि चांगली कामे केलीत आणि अल्लाहतआलाचे खूप नामस्मरण केले; आणि आपल्यावर जुलूम झाल्यानंतर, बदला घेतला; [२] ज्यांनी जुलूम केला आहे, ते पण आता जाणून घेतील की, कसल्या जागी त्यांना परतून जावयाचे आहे[३] (२२७) ११ ३६ १५

(٢٧) سُورَةُ النَّمْلِ مَكِّيَّةٌ (٤٨) — اٰيَاتُهَا ٩٣ — رُكُوعَاتُهَا ٧

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

## (२७) सू. नमल

महावाक्ये ९३ — रुकूअ ७

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

طسٓ ۚ تِلْكَ آيَاتُ الْقُرْآنِ وَكِتَابٍ مُّبِينٍ ﴿١﴾

तॉ सीन, ही महावाक्ये आहेत कुरआनाची, (म्हणजे स्पष्ट) आणि तेजपुंज पुस्तकाची (१)

هُدًى وَبُشْرَىٰ لِلْمُؤْمِنِينَ ﴿٢﴾

हिदायत आणि शुभवार्ता ईमानवाल्यांसाठी (२)

الَّذِينَ يُقِيمُونَ الصَّلَاةَ وَيُؤْتُونَ الزَّكَاةَ وَهُم بِالْآخِرَةِ هُمْ يُوقِنُونَ ﴿٣﴾

जे नमाजीला कायम करतात आणि जकात देतात आणि परलोकावर विश्वास ठेवतात[४] (३)

إِنَّ الَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِالْآخِرَةِ زَيَّنَّا لَهُمْ أَعْمَالَهُمْ فَهُمْ يَعْمَهُونَ ﴿٤﴾

नि:संशय जे लोक कयामतवर ईमान आणित नाहीत, आम्ही त्यांना त्यांची कर्मे सुशोभित करून दाखविली [५] आहेत; तर मग ते भटकत फिरतात[६] (४)

१) यांतून त्या कवींना वगळून टाकण्यात आले, ज्यांचे काव्य सत्येतेवर आधारित आहे. आणि वेगळे अशा शब्दांनी केले, ज्याने स्पष्ट होऊन जाते की, ईमानवाला, चांगली कामे नेहमी करत रहाणारा, आणि अल्लाहचे नामस्मरण भरपूर करणारा कवी, चुकीचे काव्य, ज्याच्यात खोटेपणा, मर्यादेबाहेर जाणे, कमी जास्त असणे, करूंच शकत नाही. हे त्याच लोकांचे काम आहे, जे ईमानवाल्यांच्या वैशिष्टयांने रिक्त असतील.

२) म्हणजे असे ईमानवाले कवी, या काफिर कवींना उत्तर देतात, ज्यांत त्यांनी मुसलमानांना वाईट म्हटले असेल. ज्याप्रमाणे ह.हस्सान बिन साबित ﷺ काफिरांच्या निंदाव्यंजक काव्याचे उत्तर देत असत; आणि स्वत: नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, त्यांना फर्मावित की, ''या काफिरांचे निंदाव्यंजक (काव्य) वर्णन करा. जिब्रईल عليه السلام पण तुमच्याबरोबर आहेत.'' (स.बुखारी, स.मुस्लिम) याच्याने ठाऊक झाले की, असे काव्य योग्य आहे, ज्यांत खोटेपणा आणि अतिशयोक्ती नसेल; आणि ज्यामुळे, मुशरिकीन, काफिर धर्माला न मानणारे आणि असत्यवादी, यांना उत्तर दिले जावे आणि खऱ्या मसलकाचा, आणि एकेश्वरवाद आणि सुन्नतचा पाठपुरावा केला जावा.

३) म्हणजे कोणत्या जागी ते परतून जाणार आहेत? आणि ती जागा नरकाग्नी आहे. याच्यांत अन्यायी लोकांसाठी कडक तंबी आहे. ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धा सांगण्यात आले आहे की, ''तुम्ही जुलुमापासून वांचा! यासाठी की जुलूम कयामतच्या दिवशी अंध:काराला कारणीभूत होईल'' (स.मुस्लिम)

✪ 'नमल' मुंगीला म्हणतात. या अध्यायांत मुंग्यांची एक घटना वर्णन करण्यात आली आहे; ज्यामुळे याला सू.नमल म्हणण्यात आले.

४) हा विषय निरनिराळ्या ठिकाणी येऊन चुकला आहे की, कुरआन करीम, तसे तर, संपूर्ण मानव वंशाच्या हिदायतसाठी अवतरीत झाले आहे. परंतु यापासून खरोखर, सन्मार्ग पत्करणारे तेच असतील, जे हिदायतचे इच्छुक असतील. जे लोक आपले मन व बुद्धीचे किंवाडांना, सत्य पाहण्याला आणि ऐकण्याला बंद ठेवतील; किंवा आपल्या अंत:करणाला, पापांच्या अंध:काराने झांकून टाकतील, कुरआन त्यांना कशाप्रकारे सरळ मार्गाला लावू शकते? त्यांचे उदाहरण आंधळ्यासारखे आहे. जे सूर्यप्रकाशापासून, लाभान्वित होऊं शकत नाहीत. वास्तविक सूर्याचा प्रकाश सर्व जगांकरीता, प्रकाशाला कारणीभूत आहे.

५) हे गुन्ह्याचे संकट आणि बदला आहे की, वाईट कामे, त्यांना चांगली वाटतात. आणि परलोकावर ईमान नसणे, हे याचे मूळ कारण आहे. याचा संबंध अल्लाहकडे यासाठी जोडण्यांत आला आहे की, प्रत्येक काम त्याच्या मर्जीनुसारच होत असते. तथापि यांत सुद्धांअल्लाहचे तेच तत्त्व कार्यरत आहे की, सद्गुणी लोकांकरीता पुण्याचा मार्ग, आणि दुर्जनांकरीता पापाचा मार्ग, प्रशस्त करून दिला जात असतो. परंतु या दोघांमधून, कोणा एकाचा अवलंब करणे, हे माणसाच्या आपल्या इराद्यावर अवलंबून आहे.

६) म्हणजे मार्गभ्रष्टतेच्या ज्या रस्त्यावर ते चालत असतात, त्याच्या वास्तविकतेला ते जाणित नाहीत. आणि बरोबर मार्गाकडे, मार्गदर्शन ते पावत नाही.

أُولَٰئِكَ الَّذِينَ لَهُمْ سُوٓءُ الْعَذَابِ وَهُمْ فِي الْآخِرَةِ هُمُ الْأَخْسَرُونَ ٥

हेच लोक आहेत, ज्यांच्यासाठी वाईट शिक्षा आहे; आणि परलोकांत पण ते फारच नुकसान मिळविणारे आहेत ५

وَإِنَّكَ لَتُلَقَّى الْقُرْآنَ مِن لَّدُنْ حَكِيمٍ عَلِيمٍ ٦

आणि नि:संशय तुम्हास अल्लाह, बुद्धीमान व ज्ञानीच्या कडून, कुरआन शिकविले जात आहे. ६

إِذْ قَالَ مُوسَىٰ لِأَهْلِهِ إِنِّي آنَسْتُ نَارًا سَآتِيكُم مِّنْهَا بِخَبَرٍ أَوْ آتِيكُم بِشِهَابٍ قَبَسٍ لَّعَلَّكُمْ تَصْطَلُونَ ٧

जेव्हा मूसा (अ.) ने आपल्या कुटुंबाला सांगितले की, मी आग पाहिली आहे; मी तेथून, एक तर कोणी बातमी घेऊन, किंवा आगीचा जळत असलेला अंगारा घेऊन, आता तुमच्याजवळ येऊन जाईल, की तुम्ही शेकून घ्यावे [१] ७

فَلَمَّا جَاءَهَا نُودِيَ أَن بُورِكَ مَن فِي النَّارِ وَمَنْ حَوْلَهَا وَسُبْحَانَ اللَّهِ رَبِّ الْعَالَمِينَ ٨

जेव्हा तेथे पोहोचले, तेव्हा आवाज देण्यांत आला की, धन्य आहे तो, जो या आगीत आहे. आणि धन्य आहे तो, जो याच्या जवळपास [२] आहे; आणि अल्लाह पवित्र आहे, जो सकल जगाचा पालनकर्ता आहे. [३] ८

يَا مُوسَىٰ إِنَّهُ أَنَا اللَّهُ الْعَزِيزُ الْحَكِيمُ ٩

हे मूसा ! ऐक, गोष्ट ही आहे की, मीच अल्लाह आहे, सामर्थ्यवान [४] आणि बुद्धीवान ९

وَأَلْقِ عَصَاكَ فَلَمَّا رَآهَا تَهْتَزُّ كَأَنَّهَا جَانٌّ وَلَّىٰ مُدْبِرًا وَلَمْ يُعَقِّبْ يَا مُوسَىٰ لَا تَخَفْ إِنِّي لَا يَخَافُ لَدَيَّ الْمُرْسَلُونَ ١٠

आणि तू आपली काठी टाकून दे, मूसा (अ.) ने जेव्हा तिला वळवळतांना पाहिले, अशाप्रकारे की जणू ती एक सांप आहे, तेव्हा तोंड फिरवून, पाठ फिरवित पळ काढला; आणि वळून सुद्धा पाहिले नाही (आम्ही सांगितले) हे मूसा! भिऊं[५] नकोस. माझ्या हुजुरांत पैगंबर भीत नाहीत १०

إِلَّا مَن ظَلَمَ ثُمَّ بَدَّلَ حُسْنًا بَعْدَ سُوٓءٍ فَإِنِّي غَفُورٌ رَّحِيمٌ ١١

परंतु जे लोक जुलूम करतील, [६] मग त्याच्या ऐवजी सुकृत्य करतील, या वाईटानंतर, तर मी सुद्धा क्षमाकर्ता आणि दयाळू[७] आहे. ११

१) ही त्यावेळेची घटना आहे, जेव्हा ह.मूसा عليه السلام मदयनहून आपल्या पत्नीला बरोबर घेऊन, परत येत होते; रात्री अंधारात, रस्त्याचे ज्ञान नव्हते. आणि थंडी पासून बचावासाठी, आगीची आवश्यकता होती.

२) ढुरून जेथे आगीच्या ज्वाला दिसल्या, तेथे पोहचले, म्हणजे तूर पर्वतावर. तेव्हा पाहिले की, एका हिरव्यागार वृक्षांतून, आगीच्या ज्वाला उंचच उंच उठत आहे. ही वास्तविक आग नव्हती; अल्लाहचे तेज होते. ज्याची प्रभा आगीसारखी वाटत होती. 'मन् फिन्नार' मध्ये, 'मन्' ने अभिप्रेत, अल्लाह तबारक व तआला, आणि वार ने अभिप्रेत त्याचे तेज आहे. आणि, 'व मन् हव्लहा' (याच्या आजुबाजूस) ने अभिप्रेत मूसा عليه السلام आणि देवढूत आहेत. हदीसमध्ये अल्लाहतआलाच्या व्यक्तीत्वाच्या पर्द्याला तेज (प्रकाश), आणि एका रिवायतीत नार (अग्नीने) संबोधण्यास आले आहे. आणि सांगण्यात आले आहे की, जर आपल्या व्यक्तीत्वाला (अल्लाह) परद्याशिवाय, करून देईल, तर त्याचे तेज, सर्व सृष्टीला जाळून टाकेल. (स.मुस्लीम)

३) येथे अल्लाहच्या, पावित्र्याचे वर्णनाचा अर्थ हा आहे की, या अदृष्य आवाजाने, हे न समजून घेण्यांत यावे की या आगीत किंवा वृक्षात अल्लाह एकरूप झाला आहे. ज्याप्रमाणे की पुष्कळसे मुशरिक समजतात; किंबहुना सत्त्याचे प्रत्यक्ष अनुभवण्याचे एक स्वरूप आहे. ज्याने पैगंबरीच्या सुरवातीमध्ये, पैगंबरांना सर्व साधारणपणे प्रतिष्ठीत केले जाते. कधी देवदूताच्या मार्फत, आणि कधी स्वत: अल्लाहतआला आपली आभा दाखवून आणि संभाषण करून, जसा येथे ह.मूसा عليه السلام बरोबर मामला घडला.

४) झाडांतून आवाजाचे येणे, ह.मूसा عليه السلام साठी आश्चर्याला कारणीभूत होते. अल्लाहतआलाने फर्माविले, मूसा! आश्चर्य करू नकोस, मीच अल्लाह आहे.

५) याच्याने ठाऊक झाले की, पैगंबर अदृष्टाचे ज्ञाते नसतात. नाही तर ह.मूसा عليه السلام आपल्या हातांतील लाठीने न भिते. ढुसरे, स्वाभाविक भीती पैगंबरांना पण वाटते. कारण की, सरशेवटी ते पण माणसेच असतात.

६) म्हणजेच जालीमाला तर भीती वाटावयास पाहिजे की, अल्लाहतआला कोठे त्याची पकड न करून घेवो.

७) म्हणजे जुलुमी माणसाची तौबा पण कबूल करून घेतो.

وَ اَدۡخِلۡ يَدَكَ فِىۡ جَيۡبِكَ تَخۡرُجۡ بَيۡضَآءَ مِنۡ غَيۡرِ
سُوۡٓءٍ فِىۡ تِسۡعِ اٰيٰتٍ اِلٰى فِرۡعَوۡنَ وَ قَوۡمِهٖ ؕ اِنَّهُمۡ كَانُوۡا
قَوۡمًا فٰسِقِيۡنَ ﴿۱۲﴾

आणि आपला हात आपल्या गळपट्टीत टाक, तो कुठल्याही दोषाशिवाय, (१) शुभ्र चकचकीत होऊन निघेन. तर नऊ निशाण्या घेऊन, फिरऔन आणि त्याच्या लोकांकडे जा. (२) खचित्‌च तो आज्ञाभंजकांचा (एक) गट आहे. (१२)

فَلَمَّا جَآءَتۡهُمۡ اٰيٰتُنَا مُبۡصِرَةً قَالُوۡا هٰذَا سِحۡرٌ
مُّبِيۡنٌ ﴿۱۳﴾

मग जेव्हा त्यांच्याजवळ, डोळे उघडून देणारे, (३) आमचे चमत्कार पोहचले, तेव्हा ते म्हणू लागले की ही तर धडधडीत जादू आहे (१३)

وَجَحَدُوۡا بِهَا وَاسۡتَيۡقَنَتۡهَاۤ اَنۡفُسُهُمۡ ظُلۡمًا وَّعُلُوًّا ؕ
فَانۡظُرۡ كَيۡفَ كَانَ عَاقِبَةُ الۡمُفۡسِدِيۡنَ ﴿۱۴﴾ ع ١ ٥٤ ١٦

१ ५४ १६ आणि त्यांनी मान्य केले नाही; जरी त्यांची अंत:करणे खात्री करून चुकली होती, फक्त खोडसाळपणा आणि शेखीच्या आधारावर. (४) मग पाहून घ्या की, या फिसादखोर लोकांचा परिणाम कसा काय झाला (१४)

وَلَقَدۡ اٰتَيۡنَا دَاوٗدَ وَسُلَيۡمٰنَ عِلۡمًا ۚ وَقَالَا الۡحَمۡدُ لِلّٰهِ
الَّذِىۡ فَضَّلَنَا عَلٰى كَثِيۡرٍ مِّنۡ عِبَادِهِ الۡمُؤۡمِنِيۡنَ ﴿۱۵﴾

आणि आम्ही खचित्‌च दाऊद आणि सुलैमानला ज्ञान देऊन ठेवले होते. (५) आणि दोघांनी म्हटले, (सर्व) स्तुती त्या अल्लाहसाठी आहे, ज्याने आम्हांस आपल्या पुष्कळशा ईमानदार सेवकांवर श्रेष्ठत्व प्रदान केले आहे (१५)

وَوَرِثَ سُلَيۡمٰنُ دَاوٗدَ وَقَالَ يٰۤاَيُّهَا النَّاسُ عُلِّمۡنَا
مَنۡطِقَ الطَّيۡرِ وَاُوۡتِيۡنَا مِنۡ كُلِّ شَىۡءٍ ؕ اِنَّ هٰذَا
لَهُوَ الۡفَضۡلُ الۡمُبِيۡنُ ﴿۱۶﴾

आणि दाऊदचे वारस सुलैमान झाले. (६) आणि (ते) म्हणू लागले, लोकांनो! आम्हास पक्ष्यांची भाषा शिकविण्यांत आली (७) आहे; आणि आम्हांस सर्व काही देण्यात आले आहे. (८) नि:संशय ही अल्लाहची ढळढळीत कृपा आहे. (१६)

१) म्हणजे कोडाशिवाय वगैरेच्या आजाराने. हा लाठीशिवाय दुसरा चमत्कार त्यांना दिला गेला.

२) 'फी तिसए आयातीन', म्हणजे हे दोन चमत्कार, त्या नऊ निशाण्यांमधून आहेत, ज्यांच्या मार्फत मी तुझी मदत केली आहे. त्यांना घेऊन फिरऔन आणि त्याच्या लोकांकडे जा. या नऊ निशाण्यांच्या तपशीलासाठी पहा, सू.बनी इस्राईल महावाक्य १०१ चा समास.

३) 'मुबसिरतन्' स्पष्ट आणि प्रकाशित.

४) म्हणजे ज्ञान असून सुद्धां, जे त्यांनी नाकारले, तर याचे कारण त्यांचा अन्याय आणि अहंकार होता.

५) अध्यायाच्या सुरवातीस सांगण्यांत आले होते की, हे कुरआन अल्लाहकडून शिकविण्यांत येते. याला प्रमाण म्हणून, ह.मूसा عليه السلام ची गोष्ट थोडक्यांत सांगितली. आणि आता दुसरे प्रमाण, ह.दाऊद عليه السلام आणि ह.सुलैमान عليه السلام ची ही गोष्ट आहे. पैगंबराच्या या घटना, या गोष्टीचे प्रमाण आहे की, ह.मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, अल्लाहचे खरे पैगंबर आहेत. ज्ञानाने अभिप्रेत. पैगंबरीच्या ज्ञानाशिवाय, ते ज्ञान आहे, जे ह.दाऊद व सुलैमान عليه السلام ला खास म्हणून दिले गेले होते. जसे ह.दाऊद عليه السلام ला लोखंडाच्या कारागिरीचे ज्ञान, आणि ह.सुलैमान عليه السلام ला प्राण्यांच्या बोलण्याचे ज्ञान दिले गेले होते. या दोन्ही पितापुत्रांना, आणखीही बरेच काही दिले गेले होते. परंतु येथे फक्त ज्ञानाचा उल्लेख केला गेला आहे. ज्याने स्पष्ट होते की, ज्ञान हे अल्लाहची सर्वात मोठी देणगी (न्यामत) आहे.

६) याच्याने अभिप्रेत पैगंबरी आणि राज्याचा वारसा आहे. ज्याचे वारस फक्त ह.सुलैमान عليه السلام ठरले, नाही तर ह.दाऊद عليه السلام चे आणखीही पुत्र होते. जे या वारसापासून वंचित्‌ राहिले. तसे पण पैगंबरांचा वारसा ज्ञानांतच असतो. जी धन दौलत आणि साधन सामुग्री ते सोडून जातात, तो सदका (दानधर्म) असतो; जसे की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले आहे. (स.बुखारी व स.मुस्लीम)

७) अशी तर तमाम प्राण्यांची भाषा शिकविण्यांत आली होती, परंतु पक्ष्यांचा उल्लेख खास यासाठी केला आहे की, पक्षी सावली करण्यासाठी नेहमी बरोबर रहात असत. आणि काही म्हणतात की, फक्त पक्ष्यांची भाषा शिकविण्यांत आली होती. आणि मुंग्यांपण पक्ष्यांमधून आहेत.

८) ज्याची त्यांना आवश्यकता होती, जसे ज्ञान, पैगंबरी, बुद्धी चातुर्य, धनसंपत्ती, यक्ष व मनुष्ये, आणि पक्षी आणि जनावरांना त्यांच्या आधिन करणे.

وَحُشِرَ لِسُلَيْمٰنَ جُنُوْدُهٗ مِنَ الْجِنِّ وَالْاِنْسِ وَالطَّيْرِ فَهُمْ يُوْزَعُوْنَ ۝١٧

**आणि सुलैमानांसमोर त्याचे तमाम सैन्य जिन्न आणि मनुष्ये, आणि पक्षी, जमा केले गेले.[१] (प्रत्येक प्रकार) वेगळा वेगळा (त्याच्या समोर) उभा करून देण्यांत आला[२] ⑰**

حَتّٰۤى اِذَاۤ اَتَوْا عَلٰى وَادِ النَّمْلِ ۙ قَالَتْ نَمْلَةٌ يّٰۤاَيُّهَا النَّمْلُ ادْخُلُوْا مَسٰكِنَكُمْ ۚ لَا يَحْطِمَنَّكُمْ سُلَيْمٰنُ وَجُنُوْدُهٗ ۙ وَهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ۝١٨

**जेव्हा ते मुंग्यांच्या मैदानांत पोहचले, तेव्हा एक मुंगी म्हणाली, मुंग्यांनो! आपआपल्या घरात घुसून जा. असे न व्हावे की, नकळत, सुलैमान आणि त्याचे सैन्य तुम्हांस तुडवून टाकतील[३] ⑱**

فَتَبَسَّمَ ضَاحِكًا مِّنْ قَوْلِهَا وَقَالَ رَبِّ اَوْزِعْنِيْۤ اَنْ اَشْكُرَ نِعْمَتَكَ الَّتِيْۤ اَنْعَمْتَ عَلَيَّ وَعَلٰى وَالِدَيَّ وَاَنْ اَعْمَلَ صَالِحًا تَرْضٰىهُ وَاَدْخِلْنِيْ بِرَحْمَتِكَ فِيْ عِبَادِكَ الصّٰلِحِيْنَ ۝١٩

**तिच्या या गोष्टीवर ह.सुलैमान स्मित हास्य करून, हसून पडले; आणि प्रार्थना करू लागले की हे पालनकर्त्या! तू मला सुबुद्धी दे की, मी तुझ्या त्या देणग्यांचे आभार मानावेत, ज्या तू मला बक्षीस दिल्या आहेत,[४] आणि माझ्या आई बापांबरोबर (सुद्धा) आणि मी अशी सुकृत्ये करीत रहावे, ज्यामुळे तू खूष रहावे. मला आपल्या कृपेने, सदाचरणी सेवकांत शामील करून[५] घे ⑲**

وَتَفَقَّدَ الطَّيْرَ فَقَالَ مَا لِيَ لَاۤ اَرَى الْهُدْهُدَ ۖ اَمْ كَانَ مِنَ الْغَآئِبِيْنَ ۝٢٠

**आणि त्यांनी पक्ष्यांची मोजदाद केली; आणि म्हणू लागले की, ही काय गोष्ट आहे की मी 'हुदहुद' ला पहात नाही? काय खरोखर तो गैरहजर आहे?[६] ⑳**

१) याच्यांत ह.सुलैमान عليه السلام च्या त्या वैयक्तिक वैशिष्ट्यांचे आणि श्रेष्ठत्वाचा उल्लेख आहे, ज्यांत ते, संपूर्ण मानव जातीच्या इतिहासामध्ये, आगळे वेगळे आहेत. की, त्यांचे आधिपत्य, फक्त माणसांवरच नव्हते; किंबहुना जिन्नात, जनावरे आणि चरणारे प्राणी आणि पक्षी, येथ पावेतो की, वारा सुद्धा, त्यांच्या आधिन होता. यात सांगण्यात आले आहे की, सुलैमानचे तमाम सैन्य, म्हणजे जिन्न, मनुष्ये आणि पक्षी, सर्वांना जमा करण्यांत आले. म्हणजे कोठे जाण्याकरीता हे लाव लष्कर, गोळा करण्यात आले.

२) हे भाषांतर वेगवेगळे करण्याच्या अर्थांत च्या अनुषंगाने आहे. म्हणजे सगळ्यांना वेगवेगळ्या गटांत विभागून, (प्रकारा प्रमाणे) दिले जात असे. उदाहरणार्थ मनुष्ये, जिन्नातांचा गट, पक्षी आणि प्राण्यांचे गट, वगैरे, वगैरे. दुसरा अर्थ याचा ''मग ते अडविले जात असत.'' म्हणजे हे सैन्य इतक्या मोठ्या संख्येत असे की, रस्त्यांत थांबवून थांबवून, त्यांना ठाकठीक केले जात असे. की राज्याचे सैन्य, गचाळ व्यवस्थापन, आणि फुटीचा बळी न व्हावे. म्हणजे अशा गोष्टी माझ्यापासून दूर कर, ज्या मला, तुझ्या देणग्यांवर तुझे आभार मानण्याला अडवित आहेत. याला उर्दूमध्ये, 'इल्हाम आणि तौफिक' ने अभिप्रेत करून घेतात. (फत्हुल कदीर, अयसरुत तफासीर आणि इब्ने कसीर)

३) याच्याने एक तर हे ठाऊक झाले की, जनावरांमध्ये सुद्धा एक खास प्रकारची समज आढळून येते. जरी ती मनुष्यमात्रापेक्षा फारच कमी, आणि वेगळी आहे. दुसरे हे की, ह.सुलैमान عليه السلام इतके मोठेपण आणि श्रेष्ठत्व असून सुद्धा, अदृष्टाचे ज्ञाते नव्हते. म्हणूनच मुंग्यांना धोका जाणवला की, कोठे नकळत आम्ही चिरडले न जाऊ. तिसरे हे की, प्राणी सुद्धा याच धारणेने संपन्न होते, आणि आहेत की, अल्लाहशिवाय कोणी अदृष्टाचा ज्ञाता नाही. जसे की पुढे येणाऱ्या 'हुदहुद' च्या घटनेने पण, याचे आणखी समर्थन होते. चवथे हे की, ह.सुलैमान عليه السلام पक्ष्यांशिवाय, दुसऱ्या प्राण्यांची पण भाषा समजत होते. हे ज्ञान, चमत्कार म्हणून अल्लाहतआलाने त्यांना दिले होते. जसे जिन्नतांचे आज्ञापालन वगैरे, त्यांची चमत्कार शान होती.

४) मुंग्यांसारख्या क्षुल्लक सृष्टीचे बोलणे ऐकून, समजून घेण्याने, ह.सुलैमान عليه السلام च्या मनामध्ये, आभार मानण्याची जाणिव निर्माण झाली की, अल्लाहने मला किती देणग्या देऊन उपकृत केले आहे.

५) याच्याने ठाऊक झाले की, स्वर्ग, जे ईमानवाल्यांचेच घर आहे, याच्यात कोणीपण, अल्लाहच्या कृपेशिवाय दाखल होऊ शकणार नाही. याचसाठी हदीसमध्ये, नबी ﷺ नी फर्माविले, ''सरळ सरळ आणि सत्त्याच्या जवळ रहा, आणि ही गोष्ट जाणून घ्या की, कोणी मनुष्य पण फक्त आपल्या कर्मांने, स्वर्गांत जाणार नाही. सहाबांनी विचारले, हे रसूलुल्लाह! आपण ﷺ सुद्धा? आपण ﷺ नी फर्माविले, होय! मी पण त्या वेळपर्यंत स्वर्गांत जाणार नाही, जो पर्यंत अल्लाहची कृपा मला आपल्या पदराखाली झांकून घेणार नाही.'' (स.बुखारी क्र.६४६७, मुस्लिम क्र.२१७)

६) म्हणजे उपस्थित तर आहे, पण मला दिसत नाही. किंवा येथे उपस्थितच् नाही.

لَاُعَذِّبَنَّهٗ عَذَابًا شَدِيْدًا اَوْلَاۡاَذْبَحَنَّهٗۤ اَوْ لَيَاْتِيَنِّيْ بِسُلْطٰنٍ مُّبِيْنٍ ﴿٢١﴾

**खचित्च मी त्याला कडक शिक्षा करीन अथवा त्याला हलाल करून टाकीन. किंवा (तो) माझ्यासमोर कोणी योग्य सबब सांगेन ㉑**

فَمَكَثَ غَيْرَ بَعِيْدٍ فَقَالَ اَحَطْتُّ بِمَا لَمْ تُحِطْ بِهٖ وَجِئْتُكَ مِنْ سَبَاٍۭ بِنَبَاٍ يَّقِيْنٍ ﴿٢٢﴾

**काही जास्त वेळ झाला नव्हता की, येऊन त्याने सांगितले, मी एका अशा गोष्टीची बातमी आणली आहे की आपणास त्याची काही माहितीच नाही. [१] मी 'सबा' [२] ची एक खरी बातमी, आपल्यरजवळ आणली आहे. ㉒**

اِنِّيْ وَجَدْتُّ امْرَاَةً تَمْلِكُهُمْ وَاُوْتِيَتْ مِنْ كُلِّ شَيْءٍ وَّلَهَا عَرْشٌ عَظِيْمٌ ﴿٢٣﴾

**मी पाहिले की, त्यांच्यावर एक स्त्री राज्य करीत [३] आहे; आणि प्रत्येक प्रकारच्या वस्तुंमधून तिला काही न काही देण्यांत आले आहे. आणि तिचे सिंहासन पण मोठे वैभवशाली आहे. [४] ㉓**

وَجَدْتُّهَا وَقَوْمَهَا يَسْجُدُوْنَ لِلشَّمْسِ مِنْ دُوْنِ اللّٰهِ وَزَيَّنَ لَهُمُ الشَّيْطٰنُ اَعْمَالَهُمْ فَصَدَّهُمْ عَنِ السَّبِيْلِ فَهُمْ لَا يَهْتَدُوْنَ ﴿٢٤﴾

**आणि मी तिला आणि तिच्या लोकांना, अल्लाहतआलाला सोडून, सूर्याला सज्दा करतांना पाहिले, शैतानाने त्यांची कामे, त्यांना सुशोभित करून दाखवून सरळ मार्गापासून रोकून दिले [५] आहे. म्हणून ते हिदायत ग्रहण करीत नाही. ㉔**

اَلَّا يَسْجُدُوْا لِلّٰهِ الَّذِيْ يُخْرِجُ الْخَبْءَ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَيَعْلَمُ مَا تُخْفُوْنَ وَمَا تُعْلِنُوْنَ ﴿٢٥﴾

**की त्याच अल्लाहकरीता सजदे करावे, [६] जो आकाश आणि पृथ्वीच्या गुप्त गोष्टींना बाहेर काढतो. [७] आणि जे काही तुम्ही लपवितात, आणि जे जाहीर करतात, तो सर्व काही जाणतो ㉕**

१) 'इहाता' चा अर्थ आहे, कोण्या गोष्टीच्या बाबतीत संपूर्ण ज्ञान, आणि ओळख करून घेणे.
२) 'सबा' हे मनुष्याच्या नांवावर एका समूहाचे नांव पण होते. आणि एका शहराचे नांव सुद्धा. येथे शहर अभिप्रेत आहे. हे 'सना' (यमन) पासून तीन दिवसांच्या अंतरावर आहे. मआरिबे यमनच्या नावाने प्रसिद्ध आहे.
३) म्हणजे 'हुदहुद' करिता सुद्धा ही गोष्ट आश्चर्यकारक होती की, सबामध्ये एक स्त्री सत्ताधिश आहे. परंतु आजकाल सांगण्यात येते की, स्त्रीया सुद्धा प्रत्येक मामल्यांत, पुरूषांच्या बरोबर आहेत. जर पुरूष सत्ताधिश होऊं शकतो, तर स्त्री का होऊ शकत नाही? वास्तविक हा दृष्टीकोन, इस्लामी शिक्षणाच्या विरूद्ध आहे. काही लोक, सबाची राणी (बिल्कीस) च्या या उल्लेखाने, आधार घेत म्हणतात की, स्त्रीला समान लेखणे बरोबर आहे. वास्तविक कुरआनाने एक घटना म्हणून याचा उल्लेख केला आहे. याच्याने याच्या योग्य होण्याचा किंवा न होण्याचा काही संबंध नाही. स्त्रीचे सत्ताधीश होणे अयोग्य होण्याला, कुरआन व हदीसमध्ये स्पष्ट प्रमाणे उपस्थित आहे. तपशिलाकरीता कृपया पहावे, लेखकाचे पुस्तक, ''औरत के सरबराही का मसला और मुगालेतात व शुभहात का जायजा''
४) असे सांगण्यात येते की, याची लांबी ८० हात, रूंदी ४० हात, आणि उंची ३० हात होती. आणि याच्यात मोती, लाल याकूत, आणि हिरव्या रंगाचे किंमती दगड जडलेले होते. वल्लाह आअलम! (फत्हुल कदीर) तसे हे म्हणणे अतिशयोक्तीने खाली वाटत नाही. यमनमध्ये बिलकीस चा जो महाल, भग्नावस्थेत, उपस्थित आहे, त्याच्यांत एवढ्या मोठ्या सिंहासनाला सामावून घेण्याची क्षमता नाही.
५) याचा अर्थ हा आहे की, ज्याप्रमाणे पक्ष्यांना ही समज आहे, की. अदृष्टाचे ज्ञान पैगंबर पण जाणत नाहीत; जसे की हुदहुदने ह.सुलैमान عليه السلام ला म्हटले की, मी एक अशी महत्त्वाची बातमी आणली आहे जी आपणांस पण ठाऊक नाही. अशाप्रकारे ते अल्लाहच्या एक होण्याची जाणीव आणि समज पण बाळगतात. म्हणूनच येथे हुदहुदने आश्चर्य वाटण्याच्या अंदाजात म्हटले की, ही राणी आणि तिचे लोक, अल्लाहच्याशिवाय, सूर्याचे पुजारी आहेत; आणि शैतानाच्या मागे लागलेले आहेत. ज्याने त्यांच्या करिता, सूर्याच्या उपासनेला सुशोभित करून दाखविले आहे.
६) 'अल्लायसजुदु' याचा संबंध पण 'जय्यन' च्या बरोबर आहे. म्हणजे शैतानाने हे पण त्यांच्याकरीता, सुशोभित करून दिले आहे की, त्यांनी अल्लाहला सजदा करू नये. म्हणजे यांच्या लक्षात ही गोष्ट येत नाही की, सिज्दा फक्त अल्लाहलाच करावा. (फत्हुल कदीर)
७) म्हणजे आकाशांतून पाऊस पाडतो, आणि जमिनीतून तिच्या गुप्त वस्तू, वनस्पती, खनीजे आणि दुसरे जमिनीतून निघणारे खजीने, जाहीर करतो; आणि बाहेर काढतो.

| | |
|---|---|
| اَللّٰهُ لَاۤ اِلٰهَ اِلَّا هُوَ رَبُّ الْعَرْشِ الْعَظِيْمِ ﴿٢٦﴾ | अल्लाहशिवाय अन्य कोणी खरा उपास्य नाही. तोच महासिंहासनाचा स्वामी आहे. ㉖ |
| قَالَ سَنَنْظُرُ اَصَدَقْتَ اَمْ كُنْتَ مِنَ الْكٰذِبِيْنَ ﴿٢٧﴾ | सुलैमानने [१] म्हटले, आता आम्ही पाहू की तू खरे सांगितले आहेस अथवा तू लबाड आहेस ㉗ |
| اِذْهَبْ بِّكِتٰبِيْ هٰذَا فَاَلْقِهْ اِلَيْهِمْ ثُمَّ تَوَلَّ عَنْهُمْ فَانْظُرْ مَاذَا يَرْجِعُوْنَ ﴿٢٨﴾ | माझ्या या पत्राला घेऊन जाऊन त्यांना देऊन दे. मग त्यांच्यापासून दूर हो. आणि पहा की ते काय उत्तर देतात [२] ㉘ |
| قَالَتْ يٰۤاَيُّهَا الْمَلَؤُا اِنِّيْۤ اُلْقِيَ اِلَيَّ كِتٰبٌ كَرِيْمٌ ﴿٢٩﴾ | ती म्हणू लागली, हे सरदारांनो! माझ्याकडे एक सन्माननीय पत्र टाकण्यांत आले आहे, ㉙ |
| اِنَّهٗ مِنْ سُلَيْمٰنَ وَاِنَّهٗ بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ ﴿٣٠﴾ | जे सुलैमानकडून आहे; आणि ते क्षमा करणाऱ्या, दयाळू अल्लाहच्या नांवाने सुरू आहे ㉚ |
| اَلَّا تَعْلُوْا عَلَيَّ وَاْتُوْنِيْ مُسْلِمِيْنَ ﴿٣١﴾ | हे की, तुम्ही माझ्यासमोर शिरजोरी करू नका; आणि मुसलमान बनून माझ्याकडे येऊन जा. [३] ㉛ |
| قَالَتْ يٰۤاَيُّهَا الْمَلَؤُا اَفْتُوْنِيْ فِيْۤ اَمْرِيْ مَا كُنْتُ قَاطِعَةً اَمْرًا حَتّٰى تَشْهَدُوْنِ ﴿٣٢﴾ | तिने म्हटले, हे माझ्या सरदारांनो! तुम्ही माझ्या या मामल्यांत मला सल्ला द्या. मी कुठल्याही कामाचे निर्णायक हुकूम, जोपर्यंत तुमची उपस्थिती, आणि सल्ला नसेल, देत नसते ㉜ |
| قَالُوْا نَحْنُ اُولُوْا قُوَّةٍ وَّاُولُوْا بَاْسٍ شَدِيْدٍ ۙ وَّالْاَمْرُ اِلَيْكِ فَانْظُرِيْ مَاذَا تَاْمُرِيْنَ ﴿٣٣﴾ | या सर्वांनी उत्तर दिले की, आम्ही बलाढ्य आणि सख्त लढवय्ये आहोत. [४] पुढे आपणांस अधिकार आहे, आपण स्वत:च विचार करून घ्या की, आपण आम्हांस काय हुकूम देतात [५] ㉝ |
| قَالَتْ اِنَّ الْمُلُوْكَ اِذَا دَخَلُوْا قَرْيَةً اَفْسَدُوْهَا وَجَعَلُوْۤا اَعِزَّةَ اَهْلِهَاۤ اَذِلَّةً ۚ وَكَذٰلِكَ يَفْعَلُوْنَ ﴿٣٤﴾ | ती म्हणाली की राजे, जेंव्हा कोण्या वस्तीत घुसतात, [६] तर तिला उजाडून टाकतात. आणि तेथील प्रतिष्ठीत लोकांना, फजित करून टाकतात; [७] आणि हे लोक पण असेच करतील ㉞ |

१) अल्लाहतआला, विश्वांतल्या सर्व वस्तूचा मालक आहे. परंतु येथे फक्त महासिंहासनाचा उल्लेख केला. एक तर यासाठी की, अल्लाहचे सिंहासन, विश्वांतील सर्वांत मोठी वस्तू, आणि सर्वांत श्रेष्ठ आहे. दुसरे, हे स्पष्ट करण्यासाठी की, सबाच्या राणीचे सिंहासन जरी मोठे आहे; तरी त्याची त्या महासिंहासनाशी काही, तुलनाच करता येणार नाही; ज्यावर अल्लाहतआला आपल्या शानप्रमाणे विराजमान आहे. 'हुदहुद' ने कारण की, एकेश्वरवादाचे प्रतिपादन, आणि शिर्कचे खंडन केले आहे. आणि अल्लाहचे महात्म्य आणि शानला वर्णन केले आहे; म्हणून हदीसमध्ये येते की, चार प्राण्यांना ठार करू नका. मुंगी,मधमाशी,हुदहुद आणि सरद म्हणजे लटूरा (मुसनद अहमद ३३२/१, अबुदाऊद, व इब्ने माजा) सरद् (लटूरा) याचे डोके मोठे, पोट पांढरे आणि पाठ हिरवी, असते. हा लहान लहान पक्ष्यांची शिकार करतो. (हाशिया इब्ने कसीर)

२) म्हणजे एका बाजूला सरकून, लपून जा. आणि पहा की ते आपसांत काय गोष्टी करतात.

३) ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी पण, राजांना पत्रे लिहली होती. ज्यांत त्यांना इस्लाम कबूल करण्याचे आमंत्रण दिले गेले होते. याचप्रमाणे ह.सुलैमान عليه السلام नी सुद्धा, तिला इस्लाम कबूल करण्याचे आमंत्रण पत्राद्वारे दिले. आजकाल, ज्याला पत्र लिहावयाचे, त्याचे नाव पहिले लिहले जाते; परंतु पूर्वीच्या लोकांची पद्धत ही होती जी, ह.सुलैमान عليه السلام नी अंगीकारली की, पहले आपले नाव लिहले.

४) म्हणजे आमच्याजवळ ताकद आणि स्त्रोत सुद्धा आहेत. आणि युद्धांच्या वेळेस फारच खंबीरपणे, लढणारे पण आहेत. म्हणून झुकण्याची आणि दबावाखाली येण्याची आवश्यकता नाही.

५) यासाठी की, आम्ही तर आपल्या आधिन आहोत. जो हुकूम होईल, त्यावर अंमलबजावणी करू.

६) म्हणजे ताकदीच्या जोरावर विजय मिळवीत.

७) म्हणजे ठार मारून, आणि दंगा फसाद करून, आणि कैदी बनवून.

وَإِنِّي مُرْسِلَةٌ إِلَيْهِم بِهَدِيَّةٍ فَنَاظِرَةٌ بِمَ يَرْجِعُ
الْمُرْسَلُونَ ﴿٣٥﴾

**आणि मी त्यांना एक भेट पाठविणार आहे, मग पाहून घेईन की, निरोप्या काय निरोप घेऊन परत येतो.[१] (३५)**

فَلَمَّا جَاءَ سُلَيْمَانَ قَالَ أَتُمِدُّونَنِ بِمَالٍ فَمَا آتَانِيَ
اللَّهُ خَيْرٌ مِّمَّا آتَاكُم بَلْ أَنتُم بِهَدِيَّتِكُمْ
تَفْرَحُونَ ﴿٣٦﴾

**मग जेव्हा निरोप्या ह.सुलैमान (अ.) जवळ पोहचला, तेव्हा सुलैमान (अ.) नी सांगितले काय तुम्ही लोक द्रव्याने माझी मदत करू इच्छिता?[२] मला तर माझ्या पालनकर्त्याने, याच्यापेक्षा जास्त उत्तम देऊन ठेवले आहे, जे तुम्हांस दिले आहे, बस ! तुम्हीच आपल्या भेटीवर खूष रहा[३] (३६)**

ارْجِعْ إِلَيْهِمْ فَلَنَأْتِيَنَّهُم بِجُنُودٍ لَّا قِبَلَ لَهُم بِهَا
وَلَنُخْرِجَنَّهُم مِّنْهَا أَذِلَّةً وَهُمْ صَاغِرُونَ ﴿٣٧﴾

**त्यांच्याकडे परत चालले जा .[४] आम्ही त्यांच्या (मुकाबल्यासाठी) ते सैन्य आणू, ज्याच्यासमोर वाकण्याची, त्यांच्यात शक्ती नाही. आणि आम्ही त्यांना फजीत करून, आणि नमवून तेथून बाहेर काढू[५] (३७)**

قَالَ يَا أَيُّهَا الْمَلَأُ أَيُّكُمْ يَأْتِينِي بِعَرْشِهَا قَبْلَ
أَن يَأْتُونِي مُسْلِمِينَ ﴿٣٨﴾

**आपण सांगितले हे सरदारांनो! तुमच्यात कोणी आहे, जो त्यांचे मुसलमान होऊन पोहचण्यापूर्वीच, तिचे सिंहासन मला[६] आणून देईल (३८)**

قَالَ عِفْرِيتٌ مِّنَ الْجِنِّ أَنَا آتِيكَ بِهِ قَبْلَ أَن
تَقُومَ مِن مَّقَامِكَ ۖ وَإِنِّي عَلَيْهِ لَقَوِيٌّ أَمِينٌ ﴿٣٩﴾

**एक मोठा ताकदवान जिन्न म्हणू लागला, आपण आपल्या या सभेतून[७] उठाल, याच्यापूर्वी पूर्वीच त्याला आपल्या जवळ आणून देतो.[८] खात्री बाळगा की मी असे करण्यांस समर्थ आहे. आणि प्रामाणिक[९] पण आहे. (३९)**

قَالَ الَّذِي عِندَهُ عِلْمٌ مِّنَ الْكِتَابِ أَنَا آتِيكَ بِهِ
قَبْلَ أَن يَرْتَدَّ إِلَيْكَ طَرْفُكَ ۚ فَلَمَّا رَآهُ مُسْتَقِرًّا
عِندَهُ قَالَ هَٰذَا مِن فَضْلِ رَبِّي لِيَبْلُوَنِي
أَأَشْكُرُ أَمْ أَكْفُرُ ۖ وَمَن شَكَرَ فَإِنَّمَا يَشْكُرُ لِنَفْسِهِ ۖ
وَمَن كَفَرَ فَإِنَّ رَبِّي غَنِيٌّ كَرِيمٌ ﴿٤٠﴾

**ज्याच्याजवळ पुस्तकाचे ज्ञान होते, तो बोलून पडला की, आपण पापणी लपवाल, याच्यापण पूर्वी, मी त्याला आपल्याजवळ पोचहवू शकतो.[१०] जेव्हा त्यांनी त्याला आपल्याजवळ हजर पावले; तेव्हा म्हणू लागले, हीच माझ्या पालनकर्त्याची कृपा आहे. कारण की त्याने मला अजमवावे; की मी आभार मानतो की, कृतघ्नता (करतो); आभार मानणारा आपल्याच फायद्यासाठी आभार मानतो आणि जो कृत्घ्नपणा करेल, तर माझा पालनकर्ता निरपेक्ष आणि उदार आहे. (४०)**

قَالَ نَكِّرُوا لَهَا عَرْشَهَا نَنظُرْ أَتَهْتَدِي أَمْ تَكُونُ مِنَ
الَّذِينَ لَا يَهْتَدُونَ ﴿٤١﴾

**हुकूम दिला की तिच्या सिंहासनात काही फेरबदल करून द्या.[११] जेणेकरुन ठाऊक होऊन जावे की ती मार्गास लागते किंवा, त्यांच्यातून होऊन जाते, ज्यांना मार्ग सापडत नाही.[१२] (४१)**

فَلَمَّا جَاءَتْ قِيلَ أَهَٰكَذَا عَرْشُكِ ۖ قَالَتْ كَأَنَّهُ
هُوَ ۚ وَأُوتِينَا الْعِلْمَ مِن قَبْلِهَا وَكُنَّا مُسْلِمِينَ ﴿٤٢﴾

**मग जेंव्हा ती आली तर तिला सांगण्यात आले की, असेच तुझे (ही) सिंहासन आहे. ती म्हणाली, की, हे जणू तेच आहे.[१३] आम्हास याच्या पूर्वीच ज्ञान दिले गेले होते, आणि आम्ही मुसलमान होतो[१४] (४२)**

१) यावरून कल्पना येईल, ह.सुलैमान عليه السلام कोणी दुनिया इच्छिणारा बादशाह आहेत की, पाठविलेला पैगंबर आहेत. ज्याचा उद्देश्य अल्लाहच्या धर्माचे वर्चस्व आहे. जर भेट कबूल केली नाही, तर खचितच याचा उद्देश्य धर्माची जाहिरात, आणि त्याचे वर्चस्व आहे. मग आम्हांस सुद्धांआज्ञापालनाशिवाय काही गत्यंतर रहाणार नाही.

२) म्हणजे तुम्ही पाहत नाही की, अल्लाहने मला प्रत्येक वस्तू देऊन उपकृत केले आहे. मग तुम्ही आपल्या भेटीने, माझ्या धनसंपत्तीत काय वाढ करू शकतात? हे सांगणे नकारार्थी आहे. म्हणजे काही वाढ करूंशकत नाही.

३) हे उपहास म्हणून सांगितले की, तुम्हीच या भेटीवर गर्व करा, आणि आनंदित व्हा. मी तर याच्यापासून खूष होणार नाही. यासाठी की, हे जग तर माझा उद्देश्य नाही. दुसरे, अल्लाहने मला जे काही दिले आहे, ते सकल जगात कोणालाही दिले नाही. तिसरे, मला पैगंबरी देऊन पण उपकृत केले आहे.

४) येथे 'सेगा', एक वचनाने संबोधित केले. जेव्हा की, याच्यापूर्वी, 'सेगा', अनेकवचनाने संबोधित केले होते. कारण संबोधण्यामध्ये, कधी पूर्ण समूहाचा विचार करण्यात आला आहे. तर कधी त्याच्या मुख्य माणसाचा.

५) ह.सुलैमान عليه السلام निव्वळ बादशाहच नव्हते, अल्लाहचे पैगंबरपण होते. म्हणून त्यांच्याकडून तर लोकांना, फजित

आणि अप्रतिष्ठीत, केले जाणे शक्यच नव्हते. परंतु युद्धाचा परिणाम हाच होतो. कारण की युद्ध नावच आहे, असे भिडणे ज्यात कोणाला नुकसान पोहचविले जावे, खून, आणि कैदी बनविणे, याचे आणि फजिती आणि अप्रतिष्ठेने हेच अभिप्रेत आहे. नाही तर अल्लाहचे पैगंबर लोकांना, काहीच कारण नसतांना, फजित आणि अप्रतिष्ठीत करीत नाहीत. ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचा कर्माचा रवैया, आणि चांगली वागणूक, युद्धाच्या प्रसंगी राहिली.

६) ह.सुलैमान عليه السلام च्या उत्तरांत, राणीने हा अंदाज करून घेतला की, ती सुलैमान عليه السلام चा मुकाबला करूंशकणार नाही. म्हणून त्यांनी अधीन आणि ताबेदार होऊन येण्याची तयारी सुरू करून दिली. ह.सुलैमान عليه السلام लापण यांच्या आगमणाची सूचना मिळून गेली; तेव्हा त्यांना आणखी आपली करामतीची शान दाखविण्याचा कार्यक्रम बनविला. आणि त्यांच्या पोहचण्याच्या पूर्वीच, तिचे राजसिंहासन, आपल्या जवळ मागविण्याची व्यवस्था केली.

७) याच्याने ती सभा अभिप्रेत आहे, जी दाव्यांच्या सुनावणीसाठी, ह.सुलैमान عليه السلام सकाळ पासून मध्यानापर्यंत चालवित असत.

८) याच्याने ठाऊक झाले की, तो खचित्च एक जिन्न होता, ज्यांना अल्लाहतआलाने मनुष्यांच्या तुलनेत, अद्धितीय सामर्थ्य प्रदान केले आहे. कारण की, कोण्या माणसांकरीतां, मग तो किती का शक्तीमान असेना, हे शक्यच नाही की, तो बैतुल मुकद्दस पासून मआरिबे यमन (सबा) ला जाईल, आणि मग तेथून राज सिंहासन उचलून आणेल. आणि दिड हजार मैलांचे हे अंतर, ज्याला दोन्ही कडून धरले जाईल, तर तीन हजार मैल होते. ३,४ तासांत पार करून घेईल. एक शक्तीमानांत शक्तीमान मनुष्य सुद्धा प्रथम तर एवढ्या मोठ्या सिंहासनाला उचलूच शकत नाही. आणि जर तो निरनिराळ्या लोकांचा किंवा वस्तुंचा सहारा घेऊन उचलून पण घेईल, तर इतक्या थोड्या वेळांत, एवढा प्रवास कसा काय शक्य आहे?

९) म्हणजे मी त्याला उचलून आणूपण शकतो; आणि त्याच्या कुठल्याही वस्तूत फेरबदल पण करणार नाही.

१०) हा कोण मनुष्य होता, ज्याने हे म्हटले? हे पुस्तक कोणते होते? आणि हे ज्ञान काय होते, ज्याच्या जोरावर हा दावा केला गेला? याच्यांत भाष्यकारांचे वेगवेगळे म्हणणे आहे. या तिन्हींची सत्यस्थिती अल्लाहच जाणतो. येथे कुरआनाच्या शब्दांनी हे माहित पडते की तो कोणी मनुष्यच होता. ज्याच्याजवळ अल्लाहच्या पुस्तकाचे ज्ञान होते, अल्लाहतआलाने चमत्कार म्हणून, त्याला हे सामर्थ्य देऊन दिले की पापणी लावताच तो सिंहासन घेऊन आला. करामत आणि चमत्कार नांवच अशा कामांचे आहे, जे उघड साधने, आणि सवयींची कामे, यांच्या एक दम विरूद्ध असावे. आणि ते अल्लाहतआलाचे सामर्थ्य आणि मर्जीनेच अस्तित्वांत येतात. म्हणून न तर वैयक्तिक सामर्थ्य, आश्चर्य करण्याच्या लायक आहे. न त्या ज्ञानाचा शोध घेण्याची आवश्यकता आहे, ज्याचा उल्लेख येथे आहे. कारण की ही तर त्या मनुष्याची ओळख आहे, ज्याच्या मार्फत हे काम उघडपणे झाले, नाही तर वास्तविक ही तर अल्लाहच्या मर्जीची कार्यवाही आहे; जी पापणी लावताच, जे इच्छेल, ते करू शकते. ह.सुलैमान عليه السلام पण या वास्तवाला जाणून होते. म्हणून जेव्हा त्यांनी पाहिले की सिंहासन हजर आहे. तर त्याला अल्लाहची कृपाच संबोधले.

११) म्हणजे याच्या रंगरूपात, आणि चेहऱ्यामोहऱ्यांत, व स्वरूपात बदल करून द्या.

१२) म्हणजे ती या गोष्टीला समजते की हे सिंहासन तिचेच आहे किंवा याला ओळखू शकत नाही? दुसरा अर्थ आहे की, ती हिदायतचा मार्ग पावते किंवा नाही? म्हणजे इतका मोठा चमत्कार पाहून सुद्धा तिच्यावर हिदायतचा मार्ग स्पष्ट होतो किंवा नाही?

१३) फेरबदलाने कारण की, याच्या लांबीरूंदीत आणि स्वरूपांत बदल होऊन गेला होता, म्हणून तिने स्पष्ट शब्दांत, त्याचे आपले होण्याला मान्य पण केले नाही; आणि फेरबदल असून सुद्धां, मनुष्य आपल्या वस्तुला ओळखूनच घेतो; म्हणून ते आपले असण्याचा इन्कार पण केला नाही. आणि असे म्हटले की, ''जणू हे तेच आहे'' याच्यात मान्य करणे आहे न नाकारणे. परंतु फारच समर्पक उत्तर आहे.

१४) म्हणजे येथे येण्याच्या पूर्वीच आम्ही समजून गेलो होतो की, आपण अल्लाहचे पैगंबर आहांत; आणि आपले ताबेदार आणि आज्ञांकीत होऊन गेलो होतो. परंतु इमाम इब्ने कसीर आणि शौकानी वगैरेंनी याला ह.सुलैमान عليه السلام चे म्हणणे ठरविले आहे. की आम्हास पूर्वीच हे ज्ञान देऊन देण्यात आले होते की, सबाची राणी, हुकूमाचे आधिन होऊन आपल्या सेवेत हजर होईल.

**आणि तिला त्यांनी अडवून ठेवले होते, ज्यांची ती अल्लाहच्याशिवाय उपासना करीत होती. खचितच ती काफिर लोकांमधून [१] होती.** ४३

وَصَدَّهَا مَا كَانَت تَّعْبُدُ مِن دُونِ اللَّهِ ۖ إِنَّهَا كَانَتْ مِن قَوْمٍ كَافِرِينَ ﴿٤٣﴾

**मग तिला सांगण्यात आले की, महालात दाखल हो. ज्याला पाहून हे समजून की, हा हौद आहे. तिने आपल्या पिंडऱ्या खोलून दिल्या, [२] सांगण्यात आले की ही तर काचेने मढविलेली इमारत आहे. ती म्हणू लागली, हे माझ्या पालनकर्त्या! मी आपल्या जीवावर जुलूम केला. आता मी सुलैमानाबरोबर अल्लाह–सकल जगाचा पालनकर्त्याची ताबेदार आणि आज्ञाधारक बनत आहे [३]** ४४

قِيلَ لَهَا ادْخُلِي الصَّرْحَ ۖ فَلَمَّا رَأَتْهُ حَسِبَتْهُ لُجَّةً وَكَشَفَتْ عَن سَاقَيْهَا ۚ قَالَ إِنَّهُ صَرْحٌ مُّمَرَّدٌ مِّن قَوَارِيرَ ۗ قَالَتْ رَبِّ إِنِّي ظَلَمْتُ نَفْسِي وَأَسْلَمْتُ مَعَ سُلَيْمَانَ لِلَّهِ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿٤٤﴾

**आणि खचितच आम्ही समूदकडे, त्यांचा भाऊ सॉलेहाला पाठविले की, तुम्ही सर्व, अल्लाहची उपासना करा. तरी सुद्धा ते दोन पक्ष बनून, आपसांत झगडू लागले [४]** ४५

وَلَقَدْ أَرْسَلْنَا إِلَىٰ ثَمُودَ أَخَاهُمْ صَالِحًا أَنِ اعْبُدُوا اللَّهَ فَإِذَا هُمْ فَرِيقَانِ يَخْتَصِمُونَ ﴿٤٥﴾

**आपण (सॉलेहने) सांगितले, हे माझ्या समाज बांधवांनो! तुम्ही पुण्याच्या ऐवजी, वाईटाची घाई का म्हणून माचवित आहांत? [५] तुम्ही अल्लाहतआला जवळ क्षमायाचना का म्हणून करीत नाही, कारण की तुमच्यावर दया केली जावी** ४६

قَالَ يَا قَوْمِ لِمَ تَسْتَعْجِلُونَ بِالسَّيِّئَةِ قَبْلَ الْحَسَنَةِ ۖ لَوْلَا تَسْتَغْفِرُونَ اللَّهَ لَعَلَّكُمْ تُرْحَمُونَ ﴿٤٦﴾

१) हे अल्लाहतआलाचे म्हणणे आहे. म्हणजे तिला अल्लाहच्या उपासनेपासून ज्या वस्तुंने प्रतिबंधीत केले होते, ती अल्लाहशिवाय इतराची उपासना होती. आणि याचे कारण हे होते की, तिचा संबंध एका काफिर समाजाशी होता. म्हणून ती एकेश्वरवादाच्या वास्तविकतेपासून अजाणच होती. काहींनी 'सद्दहा' चा 'फाईल' अल्लाहला आणि काहींनी ह.सुलैमान عليه السلام ला ठरविले आहे. म्हणजे अल्लाहने किंवा अल्लाहच्या हुकूमाने ह.सुलैमान عليه السلام नी, तिला अल्लाहशिवाय इतरांच्या उपासनेने प्रतिबंधीत करून दिले. परंतु पहिले कथन जास्त बरोबर आहे. (फत्हुल कदीर)

२) हा महल काचेचा बनविला होता. ज्याचे आंगण आणि खालील जमीनपण काचेची होती. 'लुज्जतन' खोल पाणी किंवा हौदाला म्हणतात. ह.सुलैमान عليه السلام नी आपल्या पैगंबरीचे चमत्कार दाखविल्यानंतर, त्यांना योग्य वाटले की, तिला आपल्या त्या ऐहिक शान शौकतची पण एक झलक दाखवून दिली जावी, ज्यात अल्लाहने त्यांना मानवी इतिहासांत आगळे वेगळे स्थान दिले होते. म्हणून तिला महालांत दाखल होण्याचा हुकूम देण्यात आला. जेव्हा ती दाखल होऊ लागली, तेव्हा तिने आपल्या पायजामा वर उचलून घेतला. काचेची जमीन, तिला पाणी वाटले, ज्यामुळे त्यापासून, आपल्या कपड्यांना वांचविण्यासाठी, तिने आपले कपडे आवरून घेतले.

३) म्हणजे जेव्हा तिच्यावर जमिनीची वास्तविकता जाहीर झाली, तेव्हा आपल्या कोताई आणि चुकीची पण जाणीव झाली. आणि आपल्या कसुराला मान्य करीत, मुसलमान झाल्याचे जाहीर करून टाकले, स्वच्छ,चिकण्या घडविलेल्या दगडांना 'मुमर्रद' म्हटले जाते. याच्यानेच 'अमरद' आहे. जे त्या सुंदर चेहऱ्याच्या मुलाला म्हटले जाते, ज्याच्या चेहऱ्यावर अजून दाढी आणि मिशा आलेल्या नसतील. ज्या वृक्षावर पाने नसतील, त्याला 'शजरतन मरदाअन' म्हटले जाते (फत्हुल कदीर) परंतु येथे हे बांधकाम किंवा मढविण्याच्या अर्थांत आहे. म्हणजे कांचेचा बनविलेला किंवा (कांचेने) मढविलेला महाल.

**विशेष टिप्पणी** – सबाची राणी (बिल्कीस) चे मुसलमान झाल्यानंतर, काय झाले? कुरआनात किंवा कोठल्याही सहीह हदीसमध्ये, याचा तपशिल भेटत नाही. भाष्यांच्या रिवायतीमध्ये, हे जरूर मिळते की, त्यांचा आपसात निकाह होऊन गेला होता. परंतु जेव्हा कुरआन आणि हदीस या खुलाशापासून मुक्त आहे, तर त्याच्या बाबतीत खामोश रहाणेच उत्तर आहे. वल्लाहु अअ्लम बिस्सबाब!

४) याच्याने अभिप्रेत काफिर आणि ईमानवाले आहेत. झगडण्याचा अर्थ प्रत्यक्ष पक्षाचा हा दावा आहे की, तो सत्त्यावर आहे.

५) म्हणजे ईमान कबूल करण्याच्या ऐवजी, तुम्ही कुफ्रवरच का आग्रह धरीत आहात, जो शिक्षेला कारणीभूत आहे. याशिवाय आपल्या हट्ट आणि शिरजोरीमुळे म्हणत असत की, आमच्यावर शिक्षा घेऊन ये. ज्याच्या उत्तरांत ह.सॉलेह عليه السلام नी हे सांगितले.

قَالُوا اطَّيَّرْنَا بِكَ وَبِمَنْ مَّعَكَ ۚ قَالَ طٰٓئِرُكُمْ عِنْدَ اللّٰهِ بَلْ اَنْتُمْ قَوْمٌ تُفْتَنُوْنَ ﴿٤٧﴾

**ते म्हणू लागले आम्हीतर, तुझा आणि तुझ्या साथीदारांचा अपशकून घेत आहोत (१) (सॉलेहने) सांगितले तुमचा अपशकून अल्लाहकडून (२) आहे; किंबहुना तुम्ही तर फितन्यांत पडलेले लोक आहात (३) ४७**

وَكَانَ فِي الْمَدِيْنَةِ تِسْعَةُ رَهْطٍ يُّفْسِدُوْنَ فِي الْاَرْضِ وَلَا يُصْلِحُوْنَ ﴿٤٨﴾

**आणि या शहरांत नऊ सरदार होते. जे मुलुखांत फिसाद फैलावित फिरत होते. आणि सुधारणा करीत नव्हते ४८**

قَالُوْا تَقَاسَمُوْا بِاللّٰهِ لَنُبَيِّتَنَّهٗ وَاَهْلَهٗ ثُمَّ لَنَقُوْلَنَّ لِوَلِيِّهٖ مَا شَهِدْنَا مَهْلِكَ اَهْلِهٖ وَاِنَّا لَصٰدِقُوْنَ ﴿٤٩﴾

**त्यांनी आपसात मोठमोठ्या शपथा वाहून, करार केला की, रात्रीच सॉलेह आणि त्याच्या कुटुंबावर, आम्ही छापा मारू;(४) आणि त्याच्या वारसदारांना स्पष्ट सांगून देऊ की, आम्ही त्याच्या कुटुंबाच्या मारल्या जाण्याचे वेळी, तेथे हजर नव्हतो. आणि आम्ही बिलकुल खरे आहोत (५) ४९**

وَمَكَرُوْا مَكْرًا وَّمَكَرْنَا مَكْرًا وَّهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ﴿٥٠﴾

**आणि त्यांनी एक डाव केला (६) आणि (७) आम्ही सुद्धा. एक ठाव केले. आणि ते त्याला (म्हणजे आमच्या डावाला) समजत नव्हते. (८) ५०**

فَانْظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ مَكْرِهِمْ ۙ اَنَّا دَمَّرْنٰهُمْ وَقَوْمَهُمْ اَجْمَعِيْنَ ﴿٥١﴾

**आता पाहून घ्या त्यांच्या डावाचा परिणाम कसा काय झाला? की, आम्ही त्यांना आणि त्यांच्या समाजातल्या, सर्वांना नष्ट करून टाकले. (९) ५१**

فَتِلْكَ بُيُوْتُهُمْ خَاوِيَةًۢ بِمَا ظَلَمُوْا ۭ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيَةً لِّقَوْمٍ يَّعْلَمُوْنَ ﴿٥٢﴾

**ही आहेत, त्यांची घरे, जी त्यांच्या जुलुमाच्या कारणाने उजाड पडलेली आहेत. जे लोक ज्ञान बाळगतात त्यांच्याकरीता याच्यांत मोठी निशाणी आहे. ५२**

१) अरब जेव्हा कधी, कोण्या काम किंवा प्रवासाचा इरादा करीत, तेव्हा पक्षाला उडवीत. जर तो उजव्या बाजूला उडाला, तर याला शुभशकून समजत आणि मग ते काम करून टाकत किंवा प्रवासाला निघून जात आणि जर डाव्या बाजूला उडाला, तर त्याला अपशकून समजत; आणि या काम किंवा प्रवासापासून थांबून जात. (फत्हुल कदीर) इस्लाममध्ये हा शकून आणि अपशकून योग्य (जाएज) नाही.

२) म्हणजे ईमानवाले वाईट होण्याला कारणीभूत नाहीत. जसे की, तुम्ही समजतात. किंबहुना याचे मूळ कारण अल्लाहजवळ आहे. कारण की मृत्यू आणि दैव त्याच्याच अखत्यारीत आहे. अर्थ हा की तुम्हास जे वाईट (दुष्काळ वगैरे) पोहचते आहे, ते अल्लाहकडून आहे. आणि याचे कारण तुमचे कुफ्र आहे.

३) किंवा बहकण्यांत ढिल देऊन, तुमची परीक्षा घेण्यात येत आहे.

४) म्हणजे ह.सॉलेह عليه السلام ला आणि त्यांच्या कुटुंबियांना ठार मारून टाकावे. या शपथा त्यांनी त्यावेळी वाहिल्या, जेव्हा उंटिणीला ठार केल्यानंतर, ह.सॉलेह عليه السلام नी त्यांना सांगितले की, तीन दिवसानंतर तुमच्यावर, शिक्षा येऊन पोहचेल. त्यांनी म्हटले की शिक्षा येण्यापूर्वीच आम्ही ह.सॉलेह عليه السلام आणि त्यांच्या कुटुंबियांना ठार मारून टाकावे.

५) म्हणजे खुनाच्या वेळी, आम्ही तेथे हजर नव्हतो. न आम्हास या गोष्टीचे ज्ञान आहे, की कोणी त्यांना ठार मारून टाकले आहे.

६) त्यांचा डाव हाच होता की, त्यांनी आपसांत शपथा वाहिल्या की, रात्रीच्या अंध:कारात या ठार करण्याच्या योजनेवर कार्यवाही केली जावी. आणि तीन दिवस पूर्ण होण्याच्या आधीच, ह.सॉलेह عليه السلام आणि त्यांच्या कुटुंबियांना ठिकाणी लावून दिले जावे.

७) म्हणजे आम्ही त्यांच्या या कारस्थानाचा बदला घेतला, आणि त्यांना नष्ट करून टाकले. याला पण 'मकरना मकरन्' ने त्यांच्याच सारख्या (डावाने) संबोधित केले.

८) अल्लाहच्या युक्तीला (डावाला) समजतच नव्हते.

९) म्हणजे आम्ही चर्चित नऊ सरदारांनाच नाही, किंबहुना त्यांच्या लोकांना पूर्णपणे नष्ट करून टाकले. कारण की ते लोक, नष्ट करण्याचे मूळ कारण, कुफ्र आणि अहंकारामध्ये, पूर्णपणे त्यांच्याबरोबर शामील होते. आणि जरी कृतीने त्यांच्या ठार करण्याच्या योजनेत शामील होऊ शकले नव्हते; कारण की, ही योजना गुप्त होती. परंतु त्यांची मनशा आणि मनाच्या आकांक्षाप्रमाणे होती; म्हणून ते पण जणू, या डावात शरीक होते, ज्या नऊ जणांनी, ह.सॉलेह عليه السلام आणि त्यांच्या घरवाल्यांच्या विरोधात तयार केला होता. म्हणून पूर्ण समाजच नष्ट होण्याला पात्र ठरविला गेला.

وَاَنْجَيْنَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَكَانُوْا يَتَّقُوْنَ ۝٥٣

**आणि आम्ही त्यांना, ज्यांनी ईमान आणले होते, आणि (अल्लाहला) भीत होते, त्यांना आम्ही वाचवून घेतले (५३)**

وَلُوْطًا اِذْ قَالَ لِقَوْمِهٖٓ اَتَاْتُوْنَ الْفَاحِشَةَ وَاَنْتُمْ تُبْصِرُوْنَ ۝٥٤

**आणि लूतचा उल्लेख कर, जेव्हा [१] की त्याने आपल्या लोकांना सांगितले, की काय, पाहून घेतल्यावर सुद्धा, तुम्ही निर्लज्जपणाची कामे करीत आहात? [२] (५४)**

اَئِنَّكُمْ لَتَاْتُوْنَ الرِّجَالَ شَهْوَةً مِّنْ دُوْنِ النِّسَآءِ ۭ بَلْ اَنْتُمْ قَوْمٌ تَجْهَلُوْنَ ۝٥٥

**ही काय गोष्ट आहे की, तुम्ही स्त्रियांना सोडून, पुरूषांजवळ, कामवासनेने येतात? [३] खरी गोष्ट ही आहे की तुम्ही मोठीच नादानी करीत आहात [४] (५५)**

فَمَا كَانَ جَوَابَ قَوْمِهٖٓ اِلَّآ اَنْ قَالُوْٓا اَخْرِجُوْٓا اٰلَ لُوْطٍ مِّنْ قَرْيَتِكُمْ ۚ اِنَّهُمْ اُنَاسٌ يَّتَطَهَّرُوْنَ ۝٥٦

**त्या लोकांचे उत्तर, याशिवाय या म्हणण्याच्या आणखी काहीच नव्हते, लूतच्या घराण्याला, आपल्या शहरातून काढून लावा. हे तर मोठेच पाक साफ बनू पाहतात [५] (५६)**

فَاَنْجَيْنٰهُ وَاَهْلَهٗٓ اِلَّا امْرَاَتَهٗ ۡ قَدَّرْنٰهَا مِنَ الْغٰبِرِيْنَ ۝٥٧

**मग आम्ही त्याला आणि त्याच्या कुटुंबाला, त्याच्या पत्नीशिवाय, सर्वांना वाचवून घेतले; तिचा अंदाज तर, बाकी रहाणाऱ्यांमध्ये, आम्ही लाऊनच चुकलो होतो [६] (५७)**

ع ٤ ١٤ ١٩

وَاَمْطَرْنَا عَلَيْهِمْ مَّطَرًا ۚ فَسَآءَ مَطَرُ الْمُنْذَرِيْنَ ۝٥٨

४ ع १४ १९

**आणि त्यांच्यावर एक खास प्रकारचा पाऊस वर्षविला, [७] तर त्या धमकी देण्यात आलेल्या लोकांवर, फारच वाईट पाऊस पडला. [८] (५८)**

قُلِ الْحَمْدُ لِلّٰهِ وَسَلٰمٌ عَلٰي عِبَادِهِ الَّذِيْنَ اصْطَفٰي ۭ آٰللّٰهُ خَيْرٌ اَمَّا يُشْرِكُوْنَ ۝٥٩

**तू सांगून टाक की, सर्व स्तुती अल्लाहकरीताच आहे, आणि त्याच्या निवडून घेतलेल्या सेवकांवर सलाम असो! [९] काय अल्लाहतआला उत्तम आहे, किंवा ते, ज्यांना हे लोक भागीदार ठरवित आहेत? [१०] (५९)**

१) म्हणजे लूतची गोष्ट आठवण करा. हे लोक अमुरिया आणि सदूम या वस्त्यांमध्ये रहात असत.

२) म्हणजे हे जाणून घेतल्यावर सुद्धा की, हे निर्लज्जपणाचे काम आहे, ही अंत:करणाची सद्सद्विवेक बुद्धी आहे; आणि जर उघड सद्सद्विवेक, म्हणजे डोळ्यांनी पहाणे अभिप्रेत असेल, तर अर्थ होईल, डोळ्यांसमोर, हे काम करतात. म्हणजे तुमची शिरजोरी या मर्यादेला पोहचली आहे की, लपण्याची आवश्यकता पण समजत नाही.

३) हे सांगणे कानउघाडणी करण्याकरीता आहे. हा निर्लज्जपणा तोच 'लावबतत्व' आहे जो तुम्ही स्त्रियांना सोडून, पुरूषांबरोबर, अस्वाभाविक कामेच्छा पूर्ण करण्याकरीतां, करतात.

४) किंवा त्याच्या निषीद्ध होण्याने, किंवा त्यांच्या पापांच्या शिक्षेने, तुम्ही अजाण आहे; नाही तर कदाचित् तुम्ही हे काम केले नसते.

५) हे उपहास किंवा थट्टा (करावयाची) म्हणून म्हटले.

६) म्हणजे पूर्वीपासून याच्या बाबतीत हा अंदाज, म्हणजे अल्लाहने ठरवून दिलेले होते की, ती त्याच मागे राहून जाणाऱ्यांमधून होऊन जाईल, जे शिक्षेत ग्रस्त होतील.

७) त्यांच्यावर जी शिक्षा आली, याचा तपशील पूर्वी येऊन चुकला आहे की, त्यांच्या वस्त्यांना त्यांच्यावर उलटून टाकण्यात आले. आणि याच्यानंतर त्यांच्यावर थरावर थर, खंगार दगडांची वर्षा झाली.

८) म्हणजे ज्यांना पैगंबरामार्फत भिवविण्यात आले, आणि त्यांच्यावर (सर्व) तर्क वितर्क पूर्ण करून देण्यात आला; ते खोटे म्हणण्यापासून आणि नाकारण्यापासून परावृत्त झाले नाहीत.

९) ज्यांना अल्लाहने पैगंबरीसाठी, आणि आपल्या सेवकांच्या मार्गदर्शनासाठी, निवडले की, लोकांनी फक्त एका अल्लाहची उपासना करावी.

१०) हे उपहासात्मक म्हणणे आहे, म्हणजे अल्लाहची उपासना उत्तम आहे; कारण की, जेव्हा सृष्टीकर्ता, रोजी देणारा, आणि स्वामी तोच आहे, तर उपासनेला पात्र, कोणी दुसरा कसा होय होऊ शकतो? जो न कोण्या वस्तुचा निर्माता आहे, न रोजी देणारा आणि न स्वामी.

أَمَّنْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْأَرْضَ وَأَنْزَلَ لَكُم مِّنَ
السَّمَاءِ مَاءً فَأَنْبَتْنَا بِهِ حَدَائِقَ ذَاتَ بَهْجَةٍ مَا كَانَ
لَكُمْ أَنْ تُنْبِتُوا شَجَرَهَا ءَإِلٰهٌ مَّعَ اللّٰهِ بَلْ هُمْ قَوْمٌ
يَعْدِلُونَ ٦٠

**बरे सांगा पाहू! आकाश आणि पृथ्वीला कोणी निर्माण केले? कोणी आकाशांतून पाऊस पाडला, मग त्यापासून हिरवेगार सुशोभित बाग उगवून दिले? या बागातील वृक्षांना, तुम्ही मुळीच उगवू शकले नसते. [१] काय अल्लाह् बरोबर अन्य कोणी उपास्य पण आहे? [२] किंबहुना हे लोक, (सरळ मार्गावरुन) हटून जातात. [३] ६०**

أَمَّنْ جَعَلَ الْأَرْضَ قَرَارًا وَّجَعَلَ خِلٰلَهَا أَنْهٰرًا وَّجَعَلَ
لَهَا رَوَاسِيَ وَجَعَلَ بَيْنَ الْبَحْرَيْنِ حَاجِزًا ءَإِلٰهٌ
مَّعَ اللّٰهِ بَلْ أَكْثَرُهُمْ لَا يَعْلَمُونَ ٦١

**काय तो, ज्याने पृथ्वीला रहाण्याचे ठिकाण बनविले; [४] आणि तिच्यांत नद्या वाहवून काढल्या; आणि तिच्या करीता पर्वत बनविले; आणि दोन समुद्रामध्ये अडकण बनविले, [५] काय अल्लाह् बरोबर अन्य कोणी उपास्य पण आहे? परंतु यांच्यातून बहुतेक काही जाणतच नाही. ६१**

أَمَّنْ يُّجِيبُ الْمُضْطَرَّ إِذَا دَعَاهُ وَيَكْشِفُ السُّوٓءَ وَيَجْعَلُكُمْ
خُلَفَاءَ الْأَرْضِ ءَإِلٰهٌ مَّعَ اللّٰهِ قَلِيلًا مَّا تَذَكَّرُونَ ٦٢

**असहाय्य (माणसा)च्या धावेला, जेव्हा की तो धावा करील, कोण मान्य करून,त्याच्या संकटाला दूर करून देतो; [६] आणि तुम्हास पृथ्वीचा खलीफा बनविले आहे; [७] काय अल्लाह् बरोबर अन्य कोणी उपास्य पण आहे? तुम्ही लोक फारच कमी उपदेश, आणि धडा घेतात. ६२**

أَمَّنْ يَّهْدِيكُمْ فِي ظُلُمٰتِ الْبَرِّ وَالْبَحْرِ وَمَنْ
يُّرْسِلُ الرِّيٰحَ بُشْرًا بَيْنَ يَدَيْ رَحْمَتِهِ ءَإِلٰهٌ مَّعَ
اللّٰهِ تَعٰلَى اللّٰهُ عَمَّا يُشْرِكُونَ ٦٣

**काय तो, जो तुम्हांस खुष्की आणि जलाच्या अंध:कारात, मार्ग दाखवतो. [८] आणि जो आपल्या रहमत (म्हणजे पावसा) पूर्वी शुभवर्तमान देणाऱ्या वाऱ्याला (म्हणून) पाठवितो. [९] काय अल्लाह्च्या बरोबर अन्य कोणी उपास्य पण आहे? ज्यांना हे सरकतदार ठरवितात, या सर्वांहून अल्लाह् थोर आणि अतीउच्च आहे. ६३**

أَمَّنْ يَّبْدَؤُا الْخَلْقَ ثُمَّ يُعِيدُهُ وَمَنْ يَّرْزُقُكُم مِّنَ
السَّمَاءِ وَالْأَرْضِ ءَإِلٰهٌ مَّعَ اللّٰهِ قُلْ هَاتُوا بُرْهَانَكُمْ
إِنْ كُنْتُمْ صٰدِقِينَ ٦٤

**काय तो, जो सृष्टीला प्रथम निर्माण करतो, मग तिला पुन्हा प्रतून घेईल [१०] आणि जो तुम्हास आकाश आणि पृथ्वीतून अन्न संपत्ती देतो; [११] काय अल्लाह् बरोबर अन्य कोणी उपास्य पण आहे? (आपण) सांगून द्या कीं, जर तुम्ही खरे आहांत, तर प्रमाण आणा, ६४**

قُلْ لَّا يَعْلَمُ مَنْ فِي السَّمٰوٰتِ وَالْأَرْضِ الْغَيْبَ إِلَّا
اللّٰهُ وَمَا يَشْعُرُونَ أَيَّانَ يُبْعَثُونَ ٦٥

**आपण सांगून द्या की, आकाशवाले आणि पृथ्वीवाले, यांच्यामधून, अल्लाह्शिवाय, कोणीही, अदृष्ट जाणत नाही. [१२] त्यांना तर हे सुध्दा ठाऊक नाही की, केव्हा उठवून उभे केले जातील.? ६५**

१) येथून,मागच्या वाक्याचे स्पष्टीकरण, आणि त्याची प्रमाणे दिली जात आहेत. कीं, तोच अल्लाह्, निर्मिती, अन्न संपत्ती आणि प्रयुक्ती वगैरे मध्ये, एकटा आहे; कोणी त्याचा सरकतदार नाही. सांगितले कीं, आकाशांची इतकी उंची आणि सौंदर्यासह बनविणारा, त्यांच्यात चमकणारे ग्रह आणि तारे, आणि भ्रमण करणारे, ताऱ्यांचे समूह बनविणारा, आणि अशाच प्रकारे, पृथ्वी आणि तिच्यात पर्वत, नद्या, समुद्र, झरे, वृक्ष आणि शेत्या, आणि नाना प्रकारचे पक्षी आणि प्राणी वगैरे निर्माण करणारा, आणि आकाशातून पाऊस पाडून, त्याच्याने सुशोभित बागा उगविणारा, कोण आहे? काय तुमच्यातून कोणी असा आहे. जो जमिनीतून वृक्षच उगवून दाखवून देईल? या सर्वांच्या उत्तरांत, मुशरिक सुध्दा म्हणत आणि मान्य करीत, कीं हे सर्व काही करणारा, अल्लाहतआला (च) आहे. जसे कीं कुरआनांत दुसऱ्या ठिकाणी आहे.(उदाहरणार्थ सू. अन्कबूत-६३)

२) म्हणजे या सर्व वास्तवांचे असून सुध्दा, काय अल्लाह् बरोबर आणखीही कोणी अशी व्यक्ती आहे, जी उपासनेच्या लायक असेल? किंवा ज्याने, यांच्यातून कोण्या वस्तूला निर्माण केले असेल? म्हणजे कोणी असा नाही, ज्याने काही बनविले असेल, किंवा उपासनेच्या लायक असेल. 'अम्मन' चा या महावाक्यांमध्ये भावार्थ हा आहे कीं, काय ती व्यक्ती, जी या सर्व वस्तूंची बनविणारे आहे, त्या व्यक्ती सारखा आहे, जो यातून कुठलीही वस्तू बनविण्यास समर्थ नाही? (इब्ने कसीर)

३) म्हणजे त्याच्या बरोबरीचा व त्याच्या सारखा ठरवितात.

४) म्हणजे स्थिर आणि मजबूत, न हलते, न डोलते, जर असे असते, तर जमिनीवर रहाणे शक्यच झाले नसते. पृथ्वीवर मोठ मोठे पर्वत बनविण्याचा उद्देश्य पण, जमिनीला हलण्याला आणि डोलण्यला, प्रतिबंध करणे हाच आहे.

५) याच्या खुलाशासाठी पहावा, सू. फूर्कान- ५३ चा समास

६) म्हणजे तोच अल्लाह् आहे, ज्याचा संकटसमयी धावा केला जातो; आणि संकटकाळी त्याच्याशी आशा बांधल्या जातात. 'मुजतर्रन' (असहाय्य) त्याच्याकडे झुकतो; आणि वाईटाला तोच दूर करतो. आणखी पहावे सू. इसराअ, आ. ६७ आणि सू. नहल आ. ५३

७) म्हणजे एका उम्मती नंतर दुसरी उम्मत, एका समाजानंतर दुसरा समाज, आणि एका वंशानंतर दुसरा वंश निर्माण करतो. नाही तर , जर तो सर्वांना एकाच वेळी अस्तित्व बहाल करता, तर पृथ्वी सुध्दा, अरूंदतेची तक्रार करती, अन्न संपत्ती उपलब्ध करून देण्यामध्ये सुध्दा, अडचणी निर्माण झाल्या असत्या. आणि हे सर्व एक दुसऱ्याचे पाय ओढण्यातच व्यस्त आणि गर्क रहाते. म्हणजे एकानंतर दुसऱ्या माणसांना निर्माण करणे, आणि एकाला दुसऱ्याचा वारस बनविणे, (खलीफा बनवणे) ही पण त्याची अगणित कृपा आहे.

८) म्हणजे आकाशावर ताऱ्यांना चमकविणारा कोण आहे? ज्यांच्या मुळे तुम्ही, अंधारामध्यें आपला मार्ग शोधतात. पर्वत आणि दऱ्यांचा निर्माण करणारा कोण आहे, जे एक दुसऱ्याकरीता सरहद्दीचे काम पण करतात. आणि रस्ता दाखविण्याचे काम पण करतात.

९) म्हणजे पावसापूर्वी थंड वारे, जे ना कि पावसाचा संदेश देणारेच असतात; किंबहुना यांच्याने, दुष्काळाने पीडित लोकांमध्यें, आनंदाची लहर पण उसळी मारते.

१०) म्हणजे कयामतच्या दिवशी, तुम्हांस, दुसऱ्यांदा जीवन प्रदान करील.

११) म्हणजे आकाशांतून पाऊस पाडून, जमिनीतून तिचे गुप्त खजीने, (धनधान्य आणि फळफळावळ) निर्माण करतो. आणि अशाप्रकारे आकाश आणि पृथ्वीचे बरकतीचे दरवाजे उघडून देतो.

१२) म्हणजे ज्याप्रमाणे चर्चीत बाबीत, अल्लाह्तआला एकटा आहे; त्याचा कोणी सरकतदार नाहीं. अशाच प्रकारे तो अदृष्टाच्या ज्ञानाच्या बाबतीत पण एकटाच आहे, त्याच्या शिवाय कोणी अदृष्टाचा ज्ञाता नाहीं. पैगंबरांना पण तेवढेच ज्ञान असते, जेवढे अल्लाह्तआला वह्य आणि मनात टाकलेल्या गोष्टीमार्फत, त्यांना दाखवून देतो; आणि जे ज्ञान कोणाच्या दाखविल्याने प्राप्त होते, त्याच्या जाणणाऱ्याला 'अदृष्टाचा ज्ञाता' म्हटले जात नाहीं. 'अदृष्टाचा ज्ञाता' तर तो आहे, जो कुठल्याही वास्त्याशिवाय आणि कोणाच्या मार्फत, आणि पंचेद्रियांच्या ज्ञानाशिवाय, वैयक्तिकरित्या, प्रत्येक गोष्टीचे ज्ञान ठेवेल, प्रत्येक वास्तविकतेचा जाणणारा असेल, आणि गुप्ताहून गुप्त गोष्ट, त्याच्या ज्ञानाच्या कक्षेबाहेर नसेल. हे वैशिष्ट्य फक्त आणि फक्त, अल्लाह्चेच आहे. म्हणून फक्त तोच अदृष्टाचा ज्ञाता आहे. याच्याशिवाय ब्रम्हांडात कोणी अदृष्टाचा ज्ञाता नाही. हजरत आयेशा ﵂ म्हणते, कीं जो अशी धारणा ठेवतो कीं, नबी सल्ललाहु अलैहि व सल्लम, उद्या पुढे येणाऱ्या घटनांचे ज्ञान ठेवतात, त्याने अल्लाह्वर फार मोठा आळ घेतला. यासाठी कीं, तो तर फर्मावित आहे की, ''आकाश आणि पृथ्वीत, अदृष्टाचे ज्ञान फक्त अल्लाह्ला आहे.'' (स.बुखारी क्र. ४८५५, स. मुस्लिम क्र. २८७, आणि तिर्मिझी क्र.३०६८) ह. कतादा ﵁ फर्मावितात कीं, अल्लाह्तआलाने तारे, तीन उद्देश्यासाठी बनविले आहेत. आकाशाची शोभा, मार्गदर्शनाचे साधन, आणि शैतानांना धोंडमार करणे, परंतु अल्लाह्च्या आदेशांनी बेखबर लोकांनी, यांच्याने अदृष्टाचे ज्ञान प्राप्त करण्याचे (जोतिष्य) ढोंग रचून ठेवले आहे. उदाहरणार्थ ते म्हणतात, जो अमक्या अमक्या ताऱ्याचे वेळी, लग्न करेल, तर असे होईल, अमक्या अमक्या ताऱ्याच्या वेळी जन्म होईल, तर असा असा होईल, वगैरे वगैरे. या सर्व काल्पनिक गोष्टी आहेत. त्यांच्या अंदाजाच्या विरूध्द, बहुतेक वेळा होत असते. तारे, पक्षी आणि जनावरांकडून अदृष्टाचे ज्ञान कशा प्रकाणे प्राप्त होऊंशकते? जेव्हा की अल्लाह्चा निर्णय तर हा आहे की, आकाश आणि पृथ्वीत, अल्लाह्च्या शिवाय कोणीही अदृष्ट जाणत नाहीं, (इब्ने कसीर)

بَلِ ادّٰرَكَ عِلْمُهُمْ فِي الْاٰخِرَةِ ۚ بَلْ هُمْ فِيْ شَكٍّ مِّنْهَا ۚ بَلْ هُمْ مِّنْهَا عَمُوْنَ ﴿٦٦﴾

किंबहुना परलोकाच्या बाबतीत, त्यांच्या ज्ञानाचा अंत होऊन चुकला आहे;[१] किंबहुना हे यांच्यासंबधी संशयांत पडलेले आहेत. किंवा हे यापासून आंधळे होऊन गेले आहेत.[२] ६६

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْٓا ءَاِذَا كُنَّا تُرٰبًا وَّاٰبَآؤُنَآ اَئِنَّا لَمُخْرَجُوْنَ ﴿٦٧﴾

आणि हे काफिर म्हणतात की, काय जेव्हा आम्ही माती होऊन जाल, आणि आमचे वाडवडील पण, काय आम्ही पुन्हा (जमिनीतून) काढले जाऊ? ६७

لَقَدْ وُعِدْنَا هٰذَا نَحْنُ وَاٰبَآؤُنَا مِنْ قَبْلُ ۙ اِنْ هٰذَآ اِلَّآ اَسَاطِيْرُ الْاَوَّلِيْنَ ﴿٦٨﴾

आम्हाला आणि आमच्या वाडवडीलांना, फार पूर्वीपासून, हे वायदे केले जात आहेत, काही नाही या तर फक्त पूर्वीच्या लोकांच्या भाकड कथा आहेत.[३] ६८

قُلْ سِيْرُوْا فِي الْاَرْضِ فَانْظُرُوْا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُجْرِمِيْنَ ﴿٦٩﴾

आपण सांगून द्या की, मुलुखात जरा हिंडून फिरून जरा पहा तर खरे की, गुन्हेगारांचा काय परिणाम झाला?[४] ६९

وَلَا تَحْزَنْ عَلَيْهِمْ وَلَا تَكُنْ فِيْ ضَيْقٍ مِّمَّا يَمْكُرُوْنَ ﴿٧٠﴾

आणि आपण यांच्या बाबतीत, दु:ख करू नये; आणि त्याच्या खटपटीने संकोचित् होऊ नये. ७०

وَيَقُوْلُوْنَ مَتٰى هٰذَا الْوَعْدُ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿٧١﴾

आणि हे म्हणतात की, हा वायदा केव्हा पूर्ण होणार जर तुम्ही खरे आहात आहे ७१

قُلْ عَسٰٓى اَنْ يَّكُوْنَ رَدِفَ لَكُمْ بَعْضُ الَّذِيْ تَسْتَعْجِلُوْنَ ﴿٧٢﴾

आपण उत्तर द्या कीं, ज्याची तुम्ही घाई करीत आहात, कदाचित् ते तुमच्या जवळ येऊन लागले असेल.[५] ७२

وَاِنَّ رَبَّكَ لَذُوْ فَضْلٍ عَلَى النَّاسِ وَلٰكِنَّ اَكْثَرَهُمْ لَا يَشْكُرُوْنَ ﴿٧٣﴾

आणि खचित्च तुमचा पालनकर्ता, सर्व लोकांवर मोठाच कृपावंत आहे, परंतु बहुतेक लोक त्याचे आभार मानीत नाहीत.[६] ७३

१) म्हणजे यांचे ज्ञान, कयामतच्या घडून येण्याच्या वेळेला, जाणून घेण्यापासून असमर्थ आहे. किंवा यांचे ज्ञान कयामतच्या बाबतीत समान आहे. जसे नबी सल्ललाहु अलैहि व सल्लम नी ह. जिब्रईल عليه السلام च्या विचारल्यावर, सांगितले होते कीं, ''कयामतच्या बाबतीत प्रश्न विचारण्यात आलेले, (नबी करीम सल्ललाहु अलैहि व सल्लम) पण प्रश्नकर्त्या (ह. जिब्रईल عليه السلام) पेक्षा जास्त ज्ञान बाळगत नाहीत.'' किंवा हा अर्थ आहे कीं, त्यांचे ज्ञान परिपूर्ण होऊन गेले. यासाठी की त्यांनी कयामतच्या बाबतीत केल्या गेलेल्या वायद्यांना, आपल्या डोळ्यांनी पाहून घेतले; जणू हे ज्ञान त्यांच्यासाठी फायदे कारक नाही. कारण कीं, इहलोकांत हे त्याला खोटे ठरवित राहिले होते. जसे फर्माविले, ''काय खूप पहाणारे आणि ऐकणारे असतील, त्याद्विवशी, जेव्हांआमच्या समोर हजर होतील; परंतु आज तर हे जालीम लोक, खुल्या बहकण्यामध्ये पडलेले आहेत.'' (सू.मर्यम-३८)

२) म्हणजे इहलोकांत, परलोकाच्या बाबतीत, शंकेत पडले आहेत किंबहुना आंधळे आहेत की, बुध्दी भ्रष्ट झाल्यामुळे, आणि अंतचक्षुच्या अभावाने परलोकावर विश्वास ठेवण्यापासून वंचित आहे.

३) म्हणजे यांच्यात वास्तविकता काही नाही, बस! एक दुसऱ्यापासून ऐकत, हे म्हणत आले आहेत.

४) हे या काफिरांच्या म्हणण्याचे उत्तर आहे कीं, मागील लोकांना पहा कीं, काय त्यांच्यावर अल्लाहच्या शिक्षा आल्या नाहीत? ज्या पैगंबरांच्या सत्यतेचे प्रमाण आहेत. अशाच प्रकारे कयामत आणि तिच्या जीवनाबाबत सुध्दा, आमचे पैगंबर जे सांगत आहेत, खात्रीपूर्वक सत्य आहे.

५) याच्याने अभिप्रेत बद्रच्या युध्दाची ती शिक्षांआहे जी ठार मारण्या आणि कैदी बनविण्याच्या स्वरूपात काफिरांना दिली गेली. किंवा कबरमध्ये होणारी शिक्षा.

६) म्हणजे शिक्षेत उशीर, हा पण अल्लाहच्या दया आणि कृपेचा एक भाग आहे. परंतु लोक तरी सुध्दा त्याच्याकडे दुर्लक्ष करून , (अल्लाहचे) आभार मानीत नाहीत.

| | |
|---|---|
| وَاِنَّ رَبَّكَ لَيَعۡلَمُ مَا تُكِنُّ صُدُوۡرُهُمۡ وَمَا يُعۡلِنُوۡنَ ﴿٧٤﴾ | आणि नि:संशय तुमचा पालनकर्ता, त्या गोष्टींना पण जाणतो, ज्याना याची अंत:करणे लपवितात. आणि ज्यांना उघड करीत आहेत. (७४) |
| وَمَا مِنۡ غَآئِبَةٍ فِى السَّمَآءِ وَالۡاَرۡضِ اِلَّا فِىۡ كِتٰبٍ مُّبِيۡنٍ ﴿٧٥﴾ | आणि आकाश आणि पृथ्वीची, कोणी गुप्त गोष्ट पण, अशी नाही, जी स्पष्ट आणि खुल्या पुस्तकांत नसेल [१] (७५) |
| اِنَّ هٰذَا الۡقُرۡاٰنَ يَقُصُّ عَلٰى بَنِىۡۤ اِسۡرَآءِيۡلَ اَكۡثَرَ الَّذِىۡ هُمۡ فِيۡهِ يَخۡتَلِفُوۡنَ ﴿٧٦﴾ | खचित्च हे कुरआन बनी इस्राईल समोर त्या बहुतेक गोष्टींचा निर्णय करीत आहे, ज्यात हे मतभेद करतात. [२] (७६) |
| وَاِنَّهٗ لَهُدًى وَّرَحۡمَةٌ لِّلۡمُؤۡمِنِيۡنَ ﴿٧٧﴾ | आणि हे कुरआन ईमानवाल्यांसाठी, खचित्च मार्गदर्शन आणि रहमत आहे. [३] (७७) |
| اِنَّ رَبَّكَ يَقۡضِىۡ بَيۡنَهُمۡ بِحُكۡمِهٖ‌ ۚ وَهُوَ الۡعَزِيۡزُ الۡعَلِيۡمُ ﴿٧٨﴾ | नि:संशय तुमचा पालनकर्ता, त्यांच्या दर्म्यान, आपल्या हुकूमाने, सर्व निर्णय करून टाकेल; [४] तो मोठाच सामर्थ्यवान आणि बुध्दीमान आहे. (७८) |
| فَتَوَكَّلۡ عَلَى اللّٰهِ‌ ؕ اِنَّكَ عَلَى الۡحَـقِّ الۡمُبِيۡنِ ﴿٧٩﴾ | बस! आपण खचित्च अल्लाहवरच भरोसा ठेवा. खचित्च आपण खऱ्या आणि स्पष्ट धर्मावर आहात [५] (७९) |
| اِنَّكَ لَا تُسۡمِعُ الۡمَوۡتٰى وَلَا تُسۡمِعُ الصُّمَّ الدُّعَآءَ اِذَا وَلَّوۡا مُدۡبِرِيۡنَ ﴿٨٠﴾ | नि:संशय तुम्ही मृताला ऐकवू शकत नाही, आणि न बहिऱ्यांना आपली पुकार ऐकवू शकतात. [६] किंबहुना ते, विन्मुख होऊन पाठ फिरवून, चालले जात आहे. [७] (८०) |
| وَمَاۤ اَنۡتَ بِهٰدِى الۡعُمۡىِ عَنۡ ضَلٰلَتِهِمۡ‌ ؕ اِنۡ تُسۡمِعُ اِلَّا مَنۡ يُّؤۡمِنُ بِاٰيٰتِنَا فَهُمۡ مُّسۡلِمُوۡنَ ﴿٨١﴾ | आणि न आपण आंधळ्यांना, त्यांच्या भटकण्यापासून मार्गदर्शन करूशकतात. [८] आपण तर फक्त त्यांना ऐकवू शकतात, ज्यांनी आमच्या निशाण्यांवर ईमान आणले आहे, मग ते आज्ञाधारक होऊन जातात. (८१) |
| وَاِذَا وَقَعَ الۡقَوۡلُ عَلَيۡهِمۡ اَخۡرَجۡنَا لَهُمۡ دَآبَّةً مِّنَ الۡاَرۡضِ تُكَلِّمُهُمۡ ۙ اَنَّ النَّاسَ كَانُوۡا بِاٰيٰتِنَا لَا يُوۡقِنُوۡنَ ﴿٨٢﴾ | आणि मग जेव्हा त्यांच्यावर शिक्षेचा वायदा सिध्द होऊन जाईल. [९] आम्ही जमिनीतून त्यांच्यासाठी एक प्राणी काढू, जो यांच्याशी बोलत असेल [१०] की, लोक आमच्या निशाण्यांवर विश्वास ठेवत नव्हते. [११] (८२) |
| وَيَوۡمَ نَحۡشُرُ مِنۡ كُلِّ اُمَّةٍ فَوۡجًا مِّمَّنۡ يُّكَذِّبُ بِاٰيٰتِنَا فَهُمۡ يُوۡزَعُوۡنَ ﴿٨٣﴾ | आणि ज्या दिवशी आम्ही प्रत्येक उम्मतीमधून त्या लोकांच्या समूहाला, जे आमच्या निशाण्यांना नाकारत होते, घेरून घेऊन येऊ. मग ते सर्वच्या सर्व वेगवेगळे करून दिले जातील. [१२] (८३) |
| حَتّٰٓى اِذَا جَآءُوۡ قَالَ اَكَذَّبۡتُمۡ بِاٰيٰتِىۡ وَلَمۡ تُحِيۡطُوۡا بِهَا عِلۡمًا اَمَّاذَا كُنۡتُمۡ تَعۡمَلُوۡنَ ﴿٨٤﴾ | जेव्हा सर्वच्यासर्व येऊन पोहचतील, तेव्हा अल्लाहतआला फर्मावील की, तुम्ही माझ्या निशाण्यांना, यावर सुध्दा की, तुम्हास याचे पूर्ण ज्ञान नव्हते, का खोटे ठरवले? [१३] आणि हे पण सांगा की तुम्ही काय काही करीत राहीला? [१४] (८४) |

१) याच्याने अभिप्रेत लौहे महफुज आहे. याच अदृष्ट गोष्टीत त्या शिक्षेचे ज्ञान पण आहे, ज्या करीता हे काफिर लोक घाई करीत आहे. परंतु याचा वेळ पण, अल्लाहने लौहे महफूज मध्ये लिहून ठेवला आहे. ज्याला फक्त तोच जाणतो. आणि जेव्हा तो वेळ येऊन पोहचतो की, त्याने कोण्या लोकांना नष्ट करण्यासाठी लिहून ठेवलेला असतो, तर मग त्यांना नष्ट करून टाकण्यात येते. ही निश्चित वेळ येण्यापूर्वी, घाई काय करतात?

२) ग्रंथधारी लोक म्हणजे यहूदी आणि खिस्त्ती, वेगवेगळ्या पंथात आणि गटात, विभागून गेले होते. त्यांच्या धारणा पण, एक दुसऱ्यापासून वेगवेगळ्या होत्या. यहूदी ह.ईसा عليه السلام वर टीका आणि त्यांचा अपमान करीत असत. आणि खिस्त्यांनी त्यांच्या शानमध्ये, मर्यादेच्या बाहेर येथपावेतो कीं, त्यांना अल्लाह् किंवा अल्लाह्चा पुत्र, ठरवून टाकले कुरआन करीम ने, त्यांच्या हवाल्याने, अशा गोष्टी वर्णन केल्या, ज्याने सत्य स्पष्ट होऊन जाते. आणि जर ते,

कुरआनाच्या वर्णन केलेल्या, सत्यतेला मानून घेतील, तर त्यांचे धारणे विषयक मतभेद संपून जातील; आणि त्यांच्यातील पंथापंथ, आणि झगडे, कमी होऊ शकतील.

३) ईमानवाल्यांचे वैशिष्ट्य, यासाठी कीं, तेच कुरआनापासून फायदा उचलत असतात.यांच्यातच ते बनी इस्राईल पण आहेत, ज्यांनी ईमान आणले होते.

४) म्हणजे कयामतच्या दिवशी यांच्यातील मतभेदांचा निर्णय करून , सत्याला असत्यापासून वेगळे करून टाकले आणि त्यांच्याप्रमाणे बक्षीस किंवा शिक्षेची, व्यवस्था करील. किंवा त्यांनी आपल्या पुस्तकांमध्ये, जे फेरबदल केले आहेत, या जगातच त्यांचा रहस्य भेद उगडे करून, त्यांच्या दर्म्यान निर्णय करून टाकेल.

५) म्हणजे आपला मामला त्याच्याच हवाली करून द्यावा, आणि त्याच्यावरच भरोसा ठेवावा. तोच आपला मददगार आहे. एक तर यासाठी कीं, आपण सत्य धर्मावर आहांत दुसरे कारण पुढे येत आहे.

६) हे या काफिरांची पर्वा न करणे, आणि फक्त अल्लाह्वर भरोसा ठेवण्याचे दुसरे कारण आहे. कीं हे लोक मृत आहेत. जे कोणाची गोष्ट ऐकून, फायदा उचलू शकत नाहीत. किंवा बहिरे आहेत, जे न ऐकतात, आणि न समजतात. आणि न (सरळ) मार्गाला लागणार आहेत. जणू काफिरांना मृतांची उपमा दिली, ज्यांच्यांत समज असते न बुध्दी आणि बहिऱ्यांना, जे हितोपदेश ऐकतात न, अल्लाह्चे आवाहन मान्य करतात.

७) म्हणजे सत्यापासून पळ काढणारे, आणि त्याचा व्देष करणारे आहेत. कारण कीं, बहिरा मनुष्य समोरासमोर पण कोणी गोष्ट ऐकूं शकत नाहीं. मग त्यावेळी कशी ऐकू शकेल, ज्या वेळी तो तोंड फिरवून घेईल. आणि पाठ फिरवून घेतलेला असेल. कुरआन करीमच्या या महावाक्याने, हे पण ठाऊक झाले कीं, मृतांना ऐकूं येण्याची धारणा, कुरआनाच्या विरूध्द आहे. मृत व्यक्ती कोणाची गोष्ट ऐकूं शकत नाही. तथापि या पासून फक्त ती स्वरूपे वगळली जातील, जेथे ऐकण्याची क्षमता, कुरआनाच्या कोण्या स्पष्ट आयातीने (नस्स) सिध्द होईल. जसे हदीस मध्ये येते की मृताला जेव्हा दफन करुन परत जातात, तर तो त्यांच्या जोड्यांचे आवाज ऐकतो. (स. बुखारी क्र. ३३८, स. मुस्लिम, क्र. २२०१) किंवा बद्रच्या युध्दात, ठार झालेल्या काफिरांना, बद्रच्या एका खाईत, फेकून देण्यात आले होते. नबी सल्ललाहु अलैहि व सल्लमनी त्यांना संबोधित केले, ज्यावर सहाबा ﵃ नी म्हटले, आपण ﷺ प्राण नसलेल्या शरीरांशी बोलत आहांत. आपण ﷺ नी फर्माविले कीं, ''हे तुमच्यापेक्षांजास्त, माझे बोलणे ऐकत आहेत.'' एक चमत्कार म्हणून, अल्लाह्तआलाने आपले बोलणे, मृत काफिरांना ऐकवून दिले (स. बुखारी क्र.१३०७)

८) म्हणजे ज्यांना अल्लाह्तआला सत्यापासून आंधळा करून टाकेल, आपण ﷺ त्यांचे अशाप्रकारे मार्गदर्शन करू शकत नाही, जे त्यांना हवे आहे, म्हणजे ईमानापर्यंत पोहचवून देईल.

९) म्हणजे जेव्हा चांगल्या कामांचा हुकूम देणारा, वाईट कामांपासून मना करणारा, राहणार नाहीं.

१०) हा जमिनीवर चालणारा प्राणी तोच आहे, जो कयामत जवळ येण्याच्या निशाण्यांमधनू आहे. जसे कीं, हदीस मध्ये आहे, नबी सल्ललाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''कयामत त्या वेळेपर्यंत कायम होणार नाही, जो पर्यंत तुम्ही दहा निशाण्या पाहून न घ्याल. याच्यांत एक प्राण्याचे निघणे आहे. (स. मुस्लिम) दुसऱ्या रिवायतीमध्यें आहे, ''सर्वांत प्रथम निशाणी जी जाहीर होईल ती आहे सूर्याचे पूर्वेच्या ऐवजी, पश्चिमेकडून उगविणे. आणि चाश्तच्या वेळीं, प्राण्यांचे निघणे या दोहोंमधून जी पहिले जाहीर होईल, दुसरी याच्यानंतर लगेच जाहीर होऊन जाईल'' (स.मुस्लिम)

११) हे प्राण्याच्या निघण्याचे कारण आहे. म्हणजे अल्लाह्तआला आपली ही निशाणी यासाठी दाखवील कीं, लोक अल्लाह्च्या निशाण्या किंवा आयातीवरं, आदेशांवर विश्वास ठेवीत नाहीत. काही म्हणतात कीं, हे वाक्य तो प्राणी आपल्या तोंडाने म्हणेल तथापि त्या प्राण्याचे लोकांशी संभाषण करण्यात काही शंका नाही, कारण कीं, कुरआनाने याचा स्प्ष्ट खुलासा केला आहे.

१२) किंवा वेगवेगळे प्रकार करून दिले जातील; म्हणजे व्याभिचाऱ्यांची टोळी, दारूड्यांची टोळी वगैरे किंवा हा अर्थ आहे की, त्यांना अडविण्यात येईल म्हणजे त्यांना इकडे तिकडे, मागेपुढे होण्यापासून थांबविले जाईल. आणि सर्वांना क्रमाक्रमाने आणून, नरकाग्नीत फेंकून देण्यात येईल.

१३) म्हणजे तुम्ही माझ्या एकेश्वरवाद आणि आवाहानाची प्रमाणे समजून घेण्याचा प्रयत्न केला नाही; आणि याच्या शिवायच महावाक्याना खोटे ठरवत राहिले.

१४) की ज्याच्यामुळे तुम्हास माझ्या महावाक्यावर व मनन करण्याची संधीच मिळाली नाही.

وَوَقَعَ الْقَوْلُ عَلَيْهِم بِمَا ظَلَمُوا فَهُمْ لَا يَنطِقُونَ ﴿٨٥﴾

**आणि यामुळे की, त्यांनी जुलूम केला होता, त्यांच्यावर गोष्ट सिध्द होऊन जाईल, आणि ते काही म्हणू शकणार नाहीत.[१] ८५**

أَلَمْ يَرَوْا أَنَّا جَعَلْنَا اللَّيْلَ لِيَسْكُنُوا فِيهِ وَالنَّهَارَ مُبْصِرًا ۚ إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَاتٍ لِّقَوْمٍ يُؤْمِنُونَ ﴿٨٦﴾

**काय ते पाहत नाही की, आम्ही रात्रीला या साठी बनविले आहे, की त्यांनी इच्यांत विश्रांती घ्यावी, आणि दिवसाला आम्ही दाखविणारा बनविले आहे;[२] खचित्‌च याच्यांत त्या लोकांसाठी निशाण्या आहेत, जे विश्वास आणि भरोसा बाळगतात. ८६**

وَيَوْمَ يُنفَخُ فِي الصُّورِ فَفَزِعَ مَن فِي السَّمَاوَاتِ وَمَن فِي الْأَرْضِ إِلَّا مَن شَاءَ اللَّهُ ۚ وَكُلٌّ أَتَوْهُ دَاخِرِينَ ﴿٨٧﴾

**आणि ज्या दिवशी सूर फुंकला जाईल, तर सर्वच्या सर्व आकाशातील आणि पृथ्वीतील , घाबरून जातील.[३] परंतु ज्याला अल्लाह्‌तआला इच्छील,[४] आणि सर्वच्या सर्व असहाय्य होऊन व नमून, त्याच्यासमोर हजर होतील. ८७**

وَتَرَى الْجِبَالَ تَحْسَبُهَا جَامِدَةً وَهِيَ تَمُرُّ مَرَّ السَّحَابِ ۚ صُنْعَ اللَّهِ الَّذِي أَتْقَنَ كُلَّ شَيْءٍ ۚ إِنَّهُ خَبِيرٌ بِمَا تَفْعَلُونَ ﴿٨٨﴾

**आणि तुम्ही पर्वतांना आपल्या जागी, स्थिर आहेत असे समजाल, परंतु ते पण ढगांप्रमाणे उडत फिरतील[५] ही अल्लाह्‌ची कारागिरी आहे, ज्याने प्रत्येक वस्तुला मजबूत बनविले आहे.[६] जे काही तुम्ही करीत आहात, तो सर्व काही जाणतो. ८८**

مَن جَاءَ بِالْحَسَنَةِ فَلَهُ خَيْرٌ مِّنْهَا وَهُم مِّن فَزَعٍ يَوْمَئِذٍ آمِنُونَ ﴿٨٩﴾

**जो मनुष्य चांगली कर्मे घेऊन येईल, त्याला त्याच्यापेक्षा उत्तम बदला मिळेल. आणि ते त्या दिवसाच्या घबराटी पासून, निर्भय राहतील.[७] ८९**

وَمَن جَاءَ بِالسَّيِّئَةِ فَكُبَّتْ وُجُوهُهُمْ فِي النَّارِ هَلْ تُجْزَوْنَ إِلَّا مَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿٩٠﴾

**आणि जे वाईट (कर्मे) घेऊन येतील, ते तोंडावाटे, आगीत झोकून दिले जातील; फक्त तोच बदला दिला जाईल, जे तुम्ही करीत राहिलांत. ९०**

१) म्हणजे यांच्याजवळ कोणी सबब असणार नाही. की जिला ते पुढे करू शकतील किंवा कयामतच्या भयानकतेमुळे, बोलण्याची क्षमता घालवून बसतील. आणि काहींच्या जवळ हे त्यावेळच्या स्थितीचे वर्णन आहे, जेव्हा त्यांच्या तोंडावर मोहर लावून टाकण्यात येईल.

२) कारण की त्यांनी याच्यात रोजी रोटी साठी धावपळ करू शकावी.

३) सूर ने अभिप्रेत तोंच कर्णा आहे, ज्याच्यात इसराफील عليه السلام अल्लाह्‌च्या हुकूमाने फुंक मारतील. हे फुंक मारणे दोन वेळा किंवा दोन पेक्षा जास्त असतील. पहिल्या फुंकमध्ये सर्व जग, घाबरून बेशुध्द, आणि दुसऱ्या फुंकने मरण पावेल. तिसऱ्या फुंकमध्ये सर्व लोक, कबरेतून जीवंत होऊन, उठून उभे राहतील. आणि काहीं जवळ एक आणखी चवथी फुंक असेल, जिच्याने सर्व लोक महेशरच्या मैदानांत जमा होऊन जातील. येथे कोणती फुंक अभिप्रेत आहे? इमाम इब्ने कसीर जवळ ही पहिली फुंक आहे. आणि इमाम शौकानी जवळ ही तिसरी फुंक आहे, जेव्हा लोक कबरीतून उठतील.

४) हे वगळलेले लोक कोण असतील; काहीच्या जवळ पैगंबर आणि शहीद, काहींच्या जवळ देवदूत, आणि काहींच्या जवळ सर्व ईमानवाले आहेत. इमाम शौकानी म्हणतात कीं, शक्य आहे कीं सर्व चर्चित लोक याच्यात शामील असावे; कारण ईमानवाले वास्तविक घाबरण्यापासून सुरक्षित राहतील (जसे कीं पुढे येत आहे.)

५) हे कयामतच्या दिवशी होईल कीं, पर्वत आपल्या जागेवर रहाणार नाहीत. किंबहुना ढगांसारखे चालतील आणि उडतील.

६) म्हणजे हे अल्लाह्‌च्या महान सामर्थ्याने होईल, ज्याने प्रत्येक वस्तुला मजबूत बनविले आहे. परंतु तो या मजबूत वस्तूंना पण कपाशीच्या गोळ्यांप्रमाणे करून देण्यास समर्थ आहे.

७) म्हणजे खरोखर आणि मोठ्या घबराटीपासून ते सुरक्षित राहतील. ''ती मोठी घबराह पण त्यांना दु:खी करूंशकणार नाही.'' (सू.अंबिया-१०३)

إِنَّمَا أُمِرْتُ أَنْ أَعْبُدَ رَبَّ هَٰذِهِ الْبَلْدَةِ الَّذِي حَرَّمَهَا وَلَهُ كُلُّ شَيْءٍ ۖ وَأُمِرْتُ أَنْ أَكُونَ مِنَ الْمُسْلِمِينَ ﴿٩١﴾

मला तर फक्त हाच हुकूम देण्यात आला आहे की, मी या शहराच्या पालनकर्त्याची उपासना करीत रहावे, ज्याने याला सन्माननीय बनविले आहे; (१) सर्व काही त्याचेच आहे; आणि मला हे पण सांगण्यात आले आहे कीं, मी आज्ञाधारकांमधून होऊन जावे. ९१

وَأَنْ أَتْلُوَ الْقُرْآنَ ۖ فَمَنِ اهْتَدَىٰ فَإِنَّمَا يَهْتَدِي لِنَفْسِهِ ۖ وَمَنْ ضَلَّ فَقُلْ إِنَّمَا أَنَا مِنَ الْمُنْذِرِينَ ﴿٩٢﴾

आणि मी कुरआनाचे पठण करीत रहावे; जो सरळ मार्गाला लागला, तो आपल्या भल्यासाठी, सरळ मार्गाला लागेल; आणि जो बहकून जाईल, तर सांगून द्या! की, मी तर फक्त सावध करणारा आहे. (२) ९२

وَقُلِ الْحَمْدُ لِلَّهِ سَيُرِيكُمْ آيَاتِهِ فَتَعْرِفُونَهَا ۚ وَمَا رَبُّكَ بِغَافِلٍ عَمَّا تَعْمَلُونَ ﴿٩٣﴾

आणि सांगून द्या की सर्व, स्तुती अल्लाहल्लाच योग्य आहे; (३) तो लवकरच आपल्या निशाण्या दाखवील, ज्यांना तुम्ही (स्वत:च) ओळखून घ्याल (४) आणि जे काही तुम्ही करीत आहात, त्यापासून तुमचा पालनकर्ता अजाण नाहीं. (५) ९३

## (२८) सूरة القصص

(٢٨) سُورَةُ الْقَصَصِ مَكِّيَّةٌ (٤٩) — آياتها ٨٨ — ركوعاتها ٩

## (२८) सू.कसस

महावाक्ये ८८ | रुकूअ ९

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

طسم ﴿١﴾

*टॉ-सीन-मीम* १

تِلْكَ آيَاتُ الْكِتَابِ الْمُبِينِ ﴿٢﴾

ही महावाक्ये आहेत, तेजस्वी पुस्तकाची २

نَتْلُو عَلَيْكَ مِنْ نَبَإِ مُوسَىٰ وَفِرْعَوْنَ بِالْحَقِّ لِقَوْمٍ يُؤْمِنُونَ ﴿٣﴾

आम्ही आपल्या समोर, मूसा आणि फिरऔनचा खराखुरा अहवाल सांगत आहोत, त्या लोकांकरीता जे ईमान बाळगतात. (६) ३

إِنَّ فِرْعَوْنَ عَلَا فِي الْأَرْضِ وَجَعَلَ أَهْلَهَا شِيَعًا يَسْتَضْعِفُ طَائِفَةً مِنْهُمْ يُذَبِّحُ أَبْنَاءَهُمْ وَيَسْتَحْيِي نِسَاءَهُمْ ۚ إِنَّهُ كَانَ مِنَ الْمُفْسِدِينَ ﴿٤﴾

खचित्च फिरऔनाने मुलूखात, शिरजोरी करून ठेवली होती; (७) आणि तेथील लोकांना पक्ष, पक्ष बनवून ठेवीले होते; (८) आणि त्यांच्या एका पक्षाला, दुर्बल करून ठेवीले होते. (९) आणि त्यांच्या मुलांना तर तो जबह करीत असे, (१०) आणि त्यांच्या मुलींना जिवंत सोडून देत असे. यात काही संशय नाही कीं तो फिसाद खोरांमधून होता. ४

وَنُرِيدُ أَنْ نَمُنَّ عَلَى الَّذِينَ اسْتُضْعِفُوا فِي الْأَرْضِ وَنَجْعَلَهُمْ أَئِمَّةً وَنَجْعَلَهُمُ الْوَارِثِينَ ﴿٥﴾

आणि मग आमची इच्छा झाली कीं, आम्ही त्यांच्या वर कृपा करावी, ज्यांना मुलुखात फारच दुर्बल करून ठेवण्यात आले होते, आणि आम्ही त्यांना सरदार बनविणे, आणि त्यांना वारस बनविण्याचा इरादा करून घेतला होता. (११) ५

وَنُمَكِّنَ لَهُمْ فِي الْأَرْضِ وَنُرِيَ فِرْعَوْنَ وَهَامَانَ وَجُنُودَهُمَا مِنْهُمْ مَا كَانُوا يَحْذَرُونَ ﴿٦﴾

आणि हे सुध्दा की, आम्ही मुलूखात, त्यांना सामर्थ्य आणि अधिकार द्यावा; (१२) आणि फिरऔन व हामान आणि त्याच्या सैन्याला, ते दाखववे, ज्याचा त्यांना अंदेशा वाटत आहे. (१३) ६

وَأَوْحَيْنَا إِلَىٰ أُمِّ مُوسَىٰ أَنْ أَرْضِعِيهِ ۖ فَإِذَا خِفْتِ عَلَيْهِ فَأَلْقِيهِ فِي الْيَمِّ وَلَا تَخَافِي وَلَا تَحْزَنِي ۖ إِنَّا رَادُّوهُ إِلَيْكِ وَجَاعِلُوهُ مِنَ الْمُرْسَلِينَ ﴿٧﴾

आणि आम्ही मूसाच्या आईला वह्य केले. (१४) की याला दूध पाजीत रहा आणि जेव्हा तुला, त्याच्या संबंधी काही भय वाटेल, तर त्याला नदी मध्यें वाहवून देणे. आणि कोणी भय तसेच, कुठलेही दु:ख बाळगू नये. (१५) आम्ही त्याला खचित्च तुझ्याकडे परतवून आणणार आहोत; (१६) आणि त्याला आपल्या पैगंबरामध्ये बनविणार आहोत. ७

१) याच्याने अभिप्रेत मक्का शहर आहे. याचा विशेष म्हणून यासाठी उल्लेख केला आहे कीं, याच्यांत खाना-ए-काबा आहे. आणि हेच रसूलुल्लाह ﷺ ला पण सर्वांत जास्त प्रिय होते. 'आदर सन्मानीय'चा अर्थ आहे, यांच्यात रक्तपात करणे, जुलूम करणे, शिकार करणे, झाडे तोडणे, येथ पावेतो कीं कांटें तोडणे, पण मना आहे. (स.बुखारी,स.मुस्लिम)

२) म्हणजे माझे काम फक्त (धर्माचा) प्रचार आहे. जो मुसलमान होऊन जाईल, त्यांत त्याचाच फायदा आहे कीं, अल्लाहच्या शिक्षेपासून वांचून जाईल. आणि जो माझ्या आवाहनाला मान्य करणार नाहीं, तर माझे काय?

अल्लाहतआला स्वत:च, त्याच्या पासून हिशेब येईल; आणि त्याला नगकाग्नीच्या शिक्षेची गोडी चाखवील.
३) की, जो कोणाला, त्या वेळेपर्यंत शिक्षा देत नाहीं, जोपर्यंत त्याच्यावर तर्कपूर्ण करून देत नाही. याच साठी पुढे सांगितले.
४) दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आम्ही त्याला जगात आणि त्याच्या मनांत, आपल्या निशाण्या दाखवू, कारण कीं, त्यांचे वर सत्य स्पष्ट होऊन जावे.'' (हा-मीम-सजदा - ५३) जर जीवनांत या निशाण्या पाहून, ते ईमान आणत नाही; तर मृत्युच्या वेळी तर, या निशाण्यांना पाहून, ते अवश्य ओळखून घेतात. परंतु त्या वेळची ओळख, काही फायदा पोहचवित नाही; याच साठी कीं, त्यावेळचे ईमान मान्य नाहीं.
५) किंबहुना प्रत्येक वस्तुला तो पहात आहे. याच्यात काफिरांसाठी कडक तंबी व मोठी धमकी आहे.
६) ही घटना या गोष्टीचे प्रमाण आहे कीं, आपण ﷺ अल्लाहचे खरे पैगंबर आहेत. कारण की अल्लाहच्या वह्या शिवाय, शेकडो वर्षापूर्वीच्या घटना बिलकुल अशाच प्रकारे वर्णन करून देणे, ज्याप्रमाणे त्या घडल्या, अशक्य आहे. तथापि, असे असून सुध्दा, याच्यापासून फायदा ईमानवाल्यांनाच होईल. कारण कीं, तेच आपल्या गोष्टींना मान्य करतील.
७) म्हणजे जुलूम आणि अत्याचारांचा त्यांने कळस करून ठेवला होता. आणि आपल्याला मोठा उपास्य म्हणवून घेत होता.
८) ज्यांच्याकडे वेगवेगळ्या कामांची जबाबदारी, आणि ड्युटया होता.
९) याच्याने अभिप्रेत बनी इस्राईल आहेत. जो त्यावेळचा श्रेष्ठतम समाज होता. परंतु एक कसोटी, परीक्षा म्हणून, फिरऔनाचा गुलाम, आणि त्याच्या जुलूम आणि अत्याचाराचा बळी बनलेला होता.
१०) ज्यामुळे काही ज्योतिषांची ही भविष्यावाणी होती की, बनी इस्राईल मध्ये, जन्म घेणाऱ्या एका बालकाच्या हातून, फिरऔनाचे नष्ट होणे, आणि त्याच्या राज्याचा अंत होईल, ज्याचा उपाय त्याने हा काढला की, प्रत्येक जन्म घेणारा इसराईली बालक ठार मारून टाकण्यांत यावा. वास्तविक त्या मूर्खाने, हा विचार केला नाहींकीं, जर जोतिषी खरा आहे, तर खचित्‌च असे होऊन राहील, मग जरी तो मुलांना ठार मारत राहील आणि जर तो खोटा आहे, तर ठार मारण्याची आवश्यकताच नव्हती (फत्हुल कदीर) काही म्हणतात कीं ह. इब्राहीम عليه السلام पासून ही शुभवार्ता चालली येत होती कीं, त्यांच्या वंशातून एक मुलगा होईल, ज्याच्या हातून इजिप्तचे राज्य नष्ट होईल. किब्त्यांनी ही शुभवार्ता, बनी इसराईलकडून ऐकली आणि फिरऔनाला याची कल्पना दिली. ज्यावर त्याने बनी इस्राईलच्या मुलांना ठार मारणे सुरू करून दिले. (इब्ने कसीर)
११) तात्पर्य असेच झाले; आणि अल्लाहतआलाने या दुर्बल आणि गुलाम समाजाला, पूर्व आणि पश्चिमेचा वारस (मालक आणि सत्ताधीश) बनवून टाकले. (सू.आअराफ-१३७) तसेच त्यांना धर्माचा पेशवा आणि इमाम पण बनवून दिले.
१२) येथे जमिनीने अभिप्रेत, सीरियाची भूमी आहे. जेथे ते कनआनच्या जमिनीचे वारस बनले, कारण कीं, इजिप्तहून निघाल्यानंतर, बनी इस्राईल इजिप्तला परत गेले नाहीत. वल्लाहुअअ्लम!
१३) म्हणजे त्यांना जी भीती वाटत होती की, एका इस्राईलीच्या हातून, फिरऔनाची आणि त्याच्या राज्याची आणि सैन्याची बर्बादी होणार; त्यांच्या या भीतीला आम्ही खरे करून दाखविले.
१४) वह्यने अभिप्रेत,मनांत गोष्ट टाकणे आहे. ते वह्य नाही, जे पैगंबरांवर देवदुतांमार्फत, अवतरीत केले जात असे. आणि जर देवदूतामार्फत पण आले असेल, तरी सुध्दा या एका वह्याने, मूसा عليه السلام च्या आईचे, पैगंबर होणे सिध्द होत नाही; कारण की देवदूत काही वेळां, सामान्य माणसाजवळ पण, येऊन जातात. जसे हदीसमध्ये एका प्रसंगात 'अकरा' 'गंजा', 'अबरस' कोडी आणि 'आमा', आंधळा जवळ, देवदूतांचे येणे सिद्ध आहे. (स.बुखारी,स.मुस्लिम)
१५) म्हणजे नदीत बुडून जाण्याने आणि व्यर्थ होण्याने, भिऊ नये; आणि त्याच्या वेगळे होण्याचे दु:ख करु नये.
१६) म्हणजे अशा पध्दतीने की, यामुळे त्याची सुटका नक्की होईल असे म्हणतात की, जेव्हा संततीला ठार मारण्याचा हा क्रम जास्त झाला, तेव्हा फिरऔनच्या लोकांना भीती वाटली, कोठे बनी इसराईलचा वंश न संपून जावा. मग श्रमाची कामे, कोठे आम्हास न करावी लागो! या भीतीचा उल्लेख त्यांनी फिरऔना जवळ केला. ज्यावर नवा आदेश जारी करून देण्यांत आला कीं, एक वर्ष मुले ठार केली जावी आणि एक वर्ष सोडून दिली जावीत ह. हारून عليه السلام या वर्षांत जन्माला आले, ज्यांत मुलांना ठार केले जात नसे. जेव्हा कीं ह. मूसा عليه السلام ठार करण्याच्या वर्षांत जन्माला आले. परंतु अल्लाहतआलाने त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था अशा प्रकारे निर्माण केली कीं, एक तर त्यांच्या आईवर गर्भारपणाची लक्षणे अशाप्रकारे प्रकट केली नाहीत कीं, ज्यामुळे फिरऔनाने सोडलेल्या दायांच्या नजरेत ती येऊन जावीत. म्हणून जन्माचा प्रसंग तर गुपचूप पार पडला; आणि ही घटना शासनाच्या नियोजन अधिकाऱ्यांच्या लक्षांत आली नाही. परंतु जन्मल्या नंतर, ठार करण्याची भीती कायम होती; जिचा उपाय स्वत: अल्लाहतआलाने वह्य, आणि गोष्ट मनांत टाकणे, यांच्या मार्फत, मूसाच्या عليه السلام च्या आईला समजाऊन दिला. म्हणून त्यांनी त्याला पेटीत झोपवून, नाईल नदीत टाकून दिले. (इब्ने कसीर)

فَالْتَقَطَهٗۤ اٰلُ فِرْعَوْنَ لِيَكُوْنَ لَهُمْ عَدُوًّا وَّحَزَنًا ؕ اِنَّ فِرْعَوْنَ وَهَامٰنَ وَجُنُوْدَهُمَا كَانُوْا خٰطِـِٕيْنَ ﴿٨﴾

**शेवटी फिरऔनाच्या लोकांनी त्या मुलाला उचलून घेतले [१] की, सरशेवटी हेच मूल त्यांचे शत्रू झाले; आणि त्यांच्या दु:खाला कारणीभूत झाले; [२] काही शंका नाहीं की, फिरऔन व हामान आणि त्यांचे सैन्य गुन्हेगार होते. [३] ⑧**

وَقَالَتِ امْرَاَتُ فِرْعَوْنَ قُرَّتُ عَيْنٍ لِّيْ وَلَكَ ؕ لَا تَقْتُلُوْهُ ۖ عَسٰۤى اَنْ يَّنْفَعَنَاۤ اَوْ نَتَّخِذَهٗ وَلَدًا وَّهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ﴿٩﴾

**आणि फिरऔनाच्या पत्नीने म्हटले की, हा तर तुझ्या आणि माझ्या डोळ्यांचा गारवा आहे, त्याला ठार मारू नका; [४] फार शक्य आहे कीं, हा आम्हांस काही फायदा पोहचवील, किंवा आम्ही त्याला आपलाच मुलगा बनवून घेऊ; [५] आणि हे लोक (काही) जाणीवच बाळगत नव्हते. [६] ⑨**

وَاَصْبَحَ فُؤَادُ اُمِّ مُوْسٰى فٰرِغًا ؕ اِنْ كَادَتْ لَتُبْدِيْ بِهٖ لَوْلَاۤ اَنْ رَّبَطْنَا عَلٰى قَلْبِهَا لِتَكُوْنَ مِنَ الْمُؤْمِنِيْنَ ﴿١٠﴾

**आणि मूसाच्या आईचे मन व्याकूळ होऊन गेले, [७] शक्यता होती की, या घटनेला ती बिलकुल उघड करुन टाकेल, जर आम्ही तिच्या मनाला धाडस न दिले असते; हे यासाठी की तिने विश्वास बाळगणाऱ्यांमध्ये रहावे. [८] ⑩**

وَقَالَتْ لِاُخْتِهٖ قُصِّيْهِ ؗ فَبَصُرَتْ بِهٖ عَنْ جُنُبٍ وَّهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ﴿١١﴾

**आणि मूसाच्या आईने त्याच्या बहिणीला [९] सांगितले, तू याच्या मागे मागे जा; तर ही त्याला दुरुन दुरुनच पाहत राहिली; [१०] आणि फिरऔनच्या लोकांना, याचे ज्ञानपण झाले नाही. ⑪**

१) ही पेटी वाहतांवाहतां, फिरऔनाच्या महाला जवळ पोहचून गेली; जो नदीचा किनाराच होता; आणि जेथे फिरऔनाच्या नोकराचाकराने तिला पकडून बाहेर काढले.

२) म्हणजे त्यांनी तर त्याला आपला मुलगा आणि डोळ्यांना गारवा बनवून घेतला होता. आणि शत्रू समजून नाही परंतु त्याच्या या कृत्याचा परिणाम हा झाला कीं तो त्यांचा शत्रू, आणि दु:खाला, कारणीभूत सिध्द झाला.

३) हे यापूर्वीचे कारण सांगणे आहे. कीं मूसा عليه السلام त्यांच्यासाठी शत्रू कसे सिध्द झाले? यासाठी कीं ते सर्व अल्लाहचे आज्ञाभंजक आणि कसुरवार होते. अल्लाहतआलाने शिक्षा म्हणून, त्यांच्या पाल्यालाच, त्यांच्या नष्ट होण्याचे साधन बनवून दिले.

४)हे त्यावेळी सांगितले जेव्हा त्यांनी पेटीत एक सौंदर्य संपन्न आणि रूपवान मुलगा बघितला. काहीच्या जवळ हे त्यावेळचे म्हणणे आहे. जेव्हा मूसाने फिरऔनाच्या दाढीचे केस ओढून घेतले होते. तेव्हा फिरऔनाने त्यांना ठार करण्याचा हुकूम देऊन दिला होता. (अयसर तफासीर) अनेक वचनाचा सेगा एक तर एकट्या फिरऔनासाठी सन्मानदर्शक म्हणून वापरला किंवा शक्य आहे तेथे त्याचे काही दरबारी उपस्थित असावेत.

५) कारण कीं फिरऔन संतती पासून वंचित होता.

६) कीं हा मुलगा, ज्याला ते आपला मुलगा बनवित आहे, हा तर तोच मुलगा आहे ज्याला मारण्यासाठी, शेकडो मुलांना ठार करण्यांत आले आहे.

७) म्हणजे त्यांचे मन प्रत्येक गोष्टी पासून, काळजी पासून रिक्त होऊन गेले आणि एकच काळजी म्हणजे मूसाचे दु:ख त्यांच्या मनात भरून राहिले. ज्याला उर्दूत 'बेकरारी' (व्याकुळता) ने संबोधित केले गेले आहे.

८) म्हणजे अति दु:खाने हे जाहीर करून देते कीं, हा त्यांचा मुलगा आहे; परंतु अल्लाहने त्यांच्या मनाला मजबूत करून दिले. ज्यावर त्यांनी सहन केले. आणि भरोसा करून घेतला कीं, अल्लाहने या मूसाला, सकुशल परतून आणण्याचा जो वायदा केला आहे, तो पूर्ण होऊन राहील.

९) मूसा عليه السلام च्या बहिणीचे नाव मर्यम बिन्ते इमरान होते. ज्याप्रमाणे ह. ईसा عليه السلام च्या आईचे नाव, मर्यम बिन्त इमरान होते. नाव आणि बापाचे नाव, दोघांचे एकच होते.

१०) तात्पर्य ती नदीच्या किनाऱ्याने, त्याला पाहत राहिली होती. येथपावेतो कीं तिने पाहून घेतले कीं, तिचा भाऊ (मूसा) फिरऔनाच्या महालांत, चालला गेला आहे.

وَحَرَّمْنَا عَلَيْهِ الْمَرَاضِعَ مِن قَبْلُ فَقَالَتْ هَلْ أَدُلُّكُمْ عَلَىٰ أَهْلِ بَيْتٍ يَكْفُلُونَهُ لَكُمْ وَهُمْ لَهُ نَاصِحُونَ ﴿١٢﴾

आणि तिच्या पोहचण्याच्या पूर्वी, आम्ही मूसावर दाईंचे दूध हराम करुन टाकले होते, [१] ती म्हणू लागली की, काय मी तुम्हास [२] असे घराणे दाखवूं? जे या मुलाचे तुमच्यासाठी पालन पोषण करील. आणि ते या मुलाचे चांगले इच्छणारे पण असेल. (१२)

فَرَدَدْنَاهُ إِلَىٰ أُمِّهِ كَيْ تَقَرَّ عَيْنُهَا وَلَا تَحْزَنَ وَلِتَعْلَمَ أَنَّ وَعْدَ اللَّهِ حَقٌّ وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿١٣﴾

मग आम्ही त्याला त्याच्या आईकडे परत पोहचवून दिले; [३] कारण की तिचे डोळे गार रहावेत; आणि क्लेशयुक्त होऊ नये, आणि जाणून घ्यावे की, अल्लाहतआलाचा वायदा खरा आहे; [४] परंतु बहुतेक लोक जाणत नाही. [५] (१३)

وَلَمَّا بَلَغَ أَشُدَّهُ وَاسْتَوَىٰ آتَيْنَاهُ حُكْمًا وَعِلْمًا ۚ وَكَذَٰلِكَ نَجْزِي الْمُحْسِنِينَ ﴿١٤﴾

आणि जेव्हा मूसा आपल्या जवानीला पोहचून गेलेत, आणि (पूर्ण ताजे) तवाने होऊन गेलेत, आम्ही त्यांना बुध्दी आणि ज्ञान प्रदान [६] केले; आणि सुकृत्य करणाऱ्यांस आम्ही असाच बदला देत असतो. (१४)

وَدَخَلَ الْمَدِينَةَ عَلَىٰ حِينِ غَفْلَةٍ مِّنْ أَهْلِهَا فَوَجَدَ فِيهَا رَجُلَيْنِ يَقْتَتِلَانِ هَٰذَا مِن شِيعَتِهِ وَهَٰذَا مِنْ عَدُوِّهِ ۖ فَاسْتَغَاثَهُ الَّذِي مِن شِيعَتِهِ عَلَى الَّذِي مِنْ عَدُوِّهِ فَوَكَزَهُ مُوسَىٰ فَقَضَىٰ عَلَيْهِ ۖ قَالَ هَٰذَا مِنْ عَمَلِ الشَّيْطَانِ ۖ إِنَّهُ عَدُوٌّ مُّضِلٌّ مُّبِينٌ ﴿١٥﴾

आणि मूसा (अ) एका अशा वेळी शहरात आले जेव्हा की शहरातील लोक बेफाम (आराम करीत) पडलेले होते; [७] येथे दोन माणसांना (आपसांत) लढताना पाहिले. हा एक तर त्यांच्या मित्रांपैकी होता; आणि दुसरा त्यांच्या शत्रुंपैकी; [८] त्याच्या जाती बांधवाने, त्याच्या विरूध्द जो त्याच्या शत्रुमधून होता, त्याच्याजवळ मदत मागितली, ज्यावर मूसाने त्याला एक ठोसा मारला, ज्यामुळे तो मरण पावला; मूसा म्हणू लागले की, हे तर शैतानी काम झाले; [९] खचित्‌च शैतान, शत्रू आणि उघडरित्या बहकविणारा आहे. [१०] (१५)

قَالَ رَبِّ إِنِّي ظَلَمْتُ نَفْسِي فَاغْفِرْ لِي فَغَفَرَ لَهُ ۚ إِنَّهُ هُوَ الْغَفُورُ الرَّحِيمُ ﴿١٦﴾

मग प्रार्थना करू लागला की, हे माझ्या पालनकर्त्या! मी स्वत: आपल्यावर जुलूम केला, तू मला क्षमा कर; [११] अल्लाहतआलाने त्याला क्षमा करून टाकले; तो फारच क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१६)

قَالَ رَبِّ بِمَا أَنْعَمْتَ عَلَيَّ فَلَنْ أَكُونَ ظَهِيرًا لِّلْمُجْرِمِينَ ﴿١٧﴾

म्हणू लागले, हे माझ्या पालनकर्त्या! जशी तू माझ्यावर कृपा केलीस, मी पण आता कोण्या गुन्हेगाराची मदत मुळीच करणार नाही [१२] (१७)

فَأَصْبَحَ فِي الْمَدِينَةِ خَائِفًا يَتَرَقَّبُ فَإِذَا الَّذِي اسْتَنصَرَهُ بِالْأَمْسِ يَسْتَصْرِخُهُ ۚ قَالَ لَهُ مُوسَىٰ إِنَّكَ لَغَوِيٌّ مُّبِينٌ ﴿١٨﴾

सकाळी सकाळी भित भित [१३] लपत छपत बातम्या काढण्यासाठीं, शहरात गेले, की अचानक तोच मनुष्य ज्याने काल त्यांची मदत मागितली होती, त्यांना हांक मारीत होता. मूसाने त्याला म्हटले कीं, यात काही संशय नाही की तू तर धडधडीत गैरमार्गी आहेस. [१४] (१८)

فَلَمَّا أَنْ أَرَادَ أَن يَبْطِشَ بِالَّذِي هُوَ عَدُوٌّ لَّهُمَا قَالَ يَا مُوسَىٰ أَتُرِيدُ أَن تَقْتُلَنِي كَمَا قَتَلْتَ نَفْسًا بِالْأَمْسِ ۖ إِن تُرِيدُ إِلَّا أَن تَكُونَ جَبَّارًا فِي الْأَرْضِ وَمَا تُرِيدُ أَن تَكُونَ مِنَ الْمُصْلِحِينَ ﴿١٩﴾

मग जेंव्हा आपल्या आणि त्याच्या शत्रुला पकडू इच्छीले, [१५] तो भांडणारा ओरडून म्हणाला [१६] कीं, हे मूसा! काय, ज्याप्रमाणे काल तू एका माणसाचा खून केला आहेस, मला पण ठार मारू इच्छितो? तू तर मुलुखात जालीम आणि शिरजोरच होऊ इच्छितो. आणि तुझा हा इरादाच नाही की, (तू) समेट घडवून आणणाऱ्यांमध्ये व्हावे. (१९)

وَجَاءَ رَجُلٌ مِّنْ أَقْصَى الْمَدِينَةِ يَسْعَىٰ قَالَ يَا مُوسَىٰ إِنَّ الْمَلَأَ يَأْتَمِرُونَ بِكَ لِيَقْتُلُوكَ فَاخْرُجْ إِنِّي لَكَ مِنَ النَّاصِحِينَ ﴿٢٠﴾

शहराच्या एका टोकांकडून, एक मनुष्य धावत धांवत आला; [१७] आणि म्हणू लागला हे मूसा! येथील सरदार तुला ठार करण्याची सल्ला मसलत करीत आहेत; बस! तू येथून फार लवकर निघून जा; (आणि) मला, आपले भले इच्छिणारा समज (२०)

१) म्हणजे आम्ही आमचे सामर्थ्य आणि घडवून आणण्याच्या हुकुमा मार्फत मूसाला आपल्या, आईच्याशिवाय आणखी कोण्या दाईचे, दूध पिण्यापासून मना करून टाकले. तात्पर्य बराच प्रयत्न करून सुद्धा कोणी दायी त्यांना दूध पाजण्यात आणि चुप करण्यांत यशस्वी होऊ शकली नाही.

२) हे सर्व दृष्य, त्यांची बहीण पहात होती. सर शेवटी असे म्हणाली कीं, मी तुम्हांस ''मी तुम्हास असे घराणे दाखवू जे त्या बाळाची, तुमच्यासाठी पालनपोषण करेल.''

३) तात्पर्य, त्यांनी मूसाच्या बहिणीला सांगितले की, जा! त्या स्त्रीला घेऊन ये. म्हणून ती पळत पळत गेली, आणि आपल्या आईला, जी मूसाची पण आई होती, बरोबर घेऊन आली.
४) जेव्हा ह. मूसा عليه السلام नी आपल्या आईचे दूध पिऊन घेतले, तेव्हा फिरऔनाने मूसाच्या आईला, महालांत रहाण्याची विनंती केली कीं, मुलाचे योग्य पालनपोषण आणि  काळजी घेतली जाऊ शकेल. परंतु त्याने सांगितले की, मी आपल्या पती आणि मुलांना सोडून, येथे राहू शकत नाही. सरशेवटी असे ठरविण्यांत आले कीं, मुलाला तीने, आपल्या बरोबरच आपल्या घरी घेऊन जावे; आणि तेथेच त्याचे पालन पोषण करावे; आणि याचा मोबदला तिला राजाच्या खजीन्यातून दिला जाईल सुबहानल्लाह! अल्लाहच्या करणीची काय कमाल!! दूध आपल्याच मुलाला पाजेल, आणि पगार फिरऔनाकडून वसुल करेल!!! अल्लाहने मूसाला परत परतवून देण्याचा वायदा किती चांगल्याप्रकारे पूर्ण केला. ''पवित्र आहे तो, ज्याच्या हातात सर्व गोष्टींच्या किल्ल्या आहेत.''
५) म्हणजे पुष्कळशी कामे अशी असतात कीं, त्यांच्या परिणामाच्या वास्तविकते कडून बहुतेक लोक अजाण असतात. परंतु अल्लाहला त्याच्या चांगल्या परिणामाचे ज्ञान असते. याच करिता अल्लाहने फर्माविले, ''होऊ शकते कीं, ज्या वस्तूला तुम्ही वाईट समजतात. यात तुमच्यासाठी भलाई असावी. आणि ज्याला तुम्ही पसंत कराल यात तुमच्यासाठी काही वाईट असावे.'' (सू.बकर :-२१६). दुसऱ्या ठिकाणी सांगितले ''होऊ शकेल की तुम्ही कोण्या गोष्टीला वाईट समजावे आणि अल्लाहने तिच्या मध्ये ,तुमच्यासाठी भलाईच भलाई ठेवली असेल.'' (सू.निसाअ'-१९)म्हणून माणसाचे शहाण पण यातच आहे,की आपल्या आवडण्या नावडण्याकडे दुर्लक्ष करुन, प्रत्येक मामल्यात,अल्लाह आणि त्यांच्या पैगंबराच्या आदेशांची अंमलबजावणी करावी, की यांतच त्याच्यासाठी भलाई आणि सुपरिणाम आहे.
६) आज्ञा आणि ज्ञानाने अभिप्रेत जर पैगंबरी आहे, तर या स्थानावर कशा प्रकारे पोहचले,याचे स्पष्टीकरण देणे, पुढील महावाक्यात आहे. काही भाष्यकारांजवळ, याच्याने अभिप्रेत पैगंबरी नाही, किंबहुना बुध्दी आणि समज,आणि ते ज्ञान आहेत, जे त्यांनी आपल्या वडीलांच्या आणि घराण्याच्या वातावरणात राहून शिकले.
७) याच्याने काहींनी मगरीब आणि इशाच्या दर्म्यान मधला वेळ, आणि काहींनी दुपारचा अर्धा वेळ, अभिप्रेत धरला आहे. ज्यावेळी लोक विश्रांती घेत असतात.
८) म्हणजे फिरऔन किबती लोकांपैकी होता.
९) याला शैतानी काम यासाठी ठरविले की, ठार मारणे हा एक फारच मोठा गुन्हा आहे. आणि ह.मूसा عليه السلام चा उद्देश्य, त्याला मुळीच ठार करण्याचा नव्हता.
१०) ज्याचे मनुष्याशी शत्रुत्व पण स्पष्ट आहे. आणि मनुष्याला बहकविण्या करिता, तो जे जे प्रयत्न करतो, ते पण गुप्त नाहींत.
११) हा योगायोगाने झालेला खून, जरी कबीरा गुनाह नव्हता; कारण मोठ्या गुन्ह्यांपासून, अल्लाहतआला आपल्या पैगंबरांचे संरक्षण करतो. तथापि, ''हसनातुल अबरार, सैय्यातुल मुकर्रबीन'' च्या अंतर्गत, हा पण असा गुन्हा दिसत होता, ज्याच्यासाठी, फार क्षमा मागणे, त्यांनी आवश्यक समजले. दुसरे त्यांना धोका होता कीं, फिरऔनाला याची सूचना मिळाली तर, याच्या बदल्यात त्यांना तो ठार न करून टाको.
१२) म्हणजे काफिर आणि तुझ्या हुकुमांचा विरोधक असेल, तू जी माझ्यावर कृपा केली आहेस, यामुळे मी त्याचा मददगार होणार नाही. काहींनी या कृपेने अभिप्रेत, त्या गुन्ह्याची माफी घेतली आहे, जो इरादा केल्याशिवाय, किब्तीच्या खुनाच्या स्वरूपांत, यांच्या कडून घडला होता.
१३) 'खाईफन्' चा अर्थ भित भित, 'यत्रक्कबु' इकडे तिकडे बघत, आणि आपल्या बाबतीत भीतीत व्यस्त.
१४) ह. मूसा عليه السلام नी त्याला झाडले कीं, तू कालपण भांडण करतांना आढळला होता; आणि आज पुन्हा तू कोणाची गचांडी धरीत आहेत; तू तर उघड गैरमार्गी, म्हणजे भांडखोर आहेस.
१५) म्हणजे ह., मूसा عليه السلام नी इच्छिले की, किबत्याला धरून घ्यावे; कारण की, तोच ह.मूसा عليه السلام आणि बनी इस्राईलचा शत्रू होता; कारण की भांडण जास्त वाढू नये.
१६) बोलवणारा (इस्राईली) समजला कीं, मूसा عليه السلام कदाचित त्याला धरू लागले आहेत, तेव्हा तो बोलून पडला कीं, हे मूसा! ज्यामुळे किब्तीच्या लक्षांत ही गोष्ट येऊन लागली कीं, काल जो खून झाला होता, त्याचा खुनी मूसा आहे. त्याने जाऊन फिरऔनाला सांगून टाकले. ज्यावर फिरऔनाने, त्याच्या बदल्यांत मूसाला ठार करण्याचा इरादा करून घेतला.
१७) हा माणूस कोण होता? काहींच्या जवळ हा, फिरऔनच्या लोकांमधून होता. जो पडद्याआड मूसाचा हितेच्छु होता आणि उघड आहे, सरदारांच्या सल्ला मसलतीची बातमी, अशाच माणसाकडून येणे, जास्त विचार करण्यासारखे आहे. काहींच्या जवळ हा मूसा عليه السلام चा जवळचा नातेवाईक आणि इसराईली होता. शहराच्या एका टोकांकडून अभिप्रेत, 'मुनफ' आहे, जेथे फिरऔनाचा महाल आणि राजधानी होती; आणि हे शहराच्या शेवटच्या टोकांवर होते.

فَخَرَجَ مِنْهَا خَآئِفًا يَّتَرَقَّبُ ۚ قَالَ رَبِّ نَجِّنِىۡ مِنَ الۡقَوۡمِ الظّٰلِمِيۡنَ ﴿٢١﴾

**मग मूसा (अ.) तेथून, भित भित, पाहत पाहत, निघून गेले; [१] (आणि) म्हणू लागले हे माझ्या पालनकर्त्या! मला जालीम लोकांच्या कंपूपासून वाचीव! [२] (२१)**

وَلَمَّا تَوَجَّهَ تِلۡقَآءَ مَدۡيَنَ قَالَ عَسٰى رَبِّىۡۤ اَنۡ يَّهۡدِيَنِىۡ سَوَآءَ السَّبِيۡلِ ﴿٢٢﴾

**आणि जेव्हा मदयनकडे आपला रोख केला, तेव्हा म्हणू लागले, मला आशा आहे की, माझा पालनकर्ता, मला सरळ मार्ग दाखवील. [३] (२२)**

وَلَمَّا وَرَدَ مَآءَ مَدۡيَنَ وَجَدَ عَلَيۡهِ اُمَّةً مِّنَ النَّاسِ يَسۡقُوۡنَ ۖ وَوَجَدَ مِنۡ دُوۡنِهِمُ امۡرَاَتَيۡنِ تَذُوۡدٰنِ ۚ قَالَ مَا خَطۡبُكُمَا ؕ قَالَتَا لَا نَسۡقِىۡ حَتّٰى يُصۡدِرَ الرِّعَآءُ ٚ وَاَبُوۡنَا شَيۡخٌ كَبِيۡرٌ ﴿٢٣﴾

**आणि मदयनच्या पाण्यावर जेव्हा ते पोहोचले, तेव्हा पाहिले की, लोकांचा एक समूह, तेथे पाणी पाजीत आहे. [४] आणि दोन स्त्रिया, वेगळे उभे राहून, आपल्या (जनावरांना) रोकत आहेत, असे पाहिले; विचारले की, तुमची काय स्थिती आहे? [५] त्या म्हणाल्या की, जो पर्यंत हे गुराखी, परत जाणार नाहीत, [६] आम्ही पाणी पाजत नाहीत. आणि आमचे वडील, फार मोठ्या वयाचे, म्हातारे आहेत. [७] (२३)**

فَسَقٰى لَهُمَا ثُمَّ تَوَلّٰۤى اِلَى الظِّلِّ فَقَالَ رَبِّ اِنِّىۡ لِمَاۤ اَنۡزَلۡتَ اِلَىَّ مِنۡ خَيۡرٍ فَقِيۡرٌ ﴿٢٤﴾

**मग आपण स्वत; त्या जनावरांना पाणी पाजून दिले. मग सावलीकडे येऊन बसले, आणि म्हणू लागले, हे माझ्या पालनकर्त्या! तू जी काही भलाई माझ्या कडे पाठवशील, तिचा मी गरजवंत आहे. [८] (२४)**

१) जेव्हा ह.मूसा عليه السلام च्या लक्षांत ही गोष्ट आली, तेव्हा तेथून निघून पडले; की फिरऔनाच्या पकडीत येऊ न शकावे.

२) म्हणजे फिरऔन आणि त्याच्या दरबारी मंडळीकडून, ज्यांनी आपसात ह. मूसा. عليه السلام ला ठार करण्याची सल्ला मसलत केली होती. असे म्हणतात की, ह.मूसा عليه السلام ला याचे काही ज्ञान नव्हते की, कोठे जावयाचे आहे? कारण इजिप्त सोडण्याचा हा प्रसंग, बिलकूल अचानक एकदम पुढे आला. पूर्वीपासून काही विचार आणि नियोजन नव्हते. तात्पर्य, अल्लाहने घोड्यावर एका देवदूताला पाठवून दिले. ज्याने त्यांना रस्त्याचे मार्गदर्शन केले. वल्लाह् अअ्लम! (इब्ने कसीर).

३) तात्पर्य अल्लाहने त्यांची ही दुआ मान्य केली; आणि अशा सरळ रस्त्याकडे त्यांचे मार्गदर्शन करुन दिले, ज्याने त्यांचे इहलोकपण चांगले होऊन गेले आणि परलोक सुध्दा म्हणजे ते मार्गदर्शक (दाही) पण बनून गेले, आणि मार्ग धरणारे, स्वत: पण हिदायत मिळविली, आणि दुसऱ्यांना पण हिदायतचा मार्ग दाखवणारे.

४) म्हणजे जेव्हा मदयनला पोहचले, तर त्याच्या घाटावर पाहिले की, लोकांची गर्दी आहे, जे आपल्या जनावरांना पाणी पाजत आहेत. 'मदयन' हे एका घराण्याचे नांव होते. आणि ह. इब्राहीम عليه السلام च्या संततीमधून होते. जेव्हा की, मूसा عليه السلام ह. याकूब عليه السلام च्या वंशातून होते, जो. ह. इब्राहीम عليه السلام चे नातू (ह. इस्हाकचे मुलगे) होते. अशा प्रकारे मदयनवाले आणि ह. मूसांच्या दर्म्यान, वांशिक संबंध पण होता. (अयसरुत तफासीर) आणि हेच ह. शोएब عليه السلام चे रहाण्याचे ठिकाण, आणि पैगंबरीचे ठिकाण, पण होते.

५) दोन स्त्रीयांना आपली जनावरे थोपवित, उभे पाहून, ह. मूसा عليه السلام च्या मनांत दया आली; आणि त्यांना विचारले, 'काय गोष्ट आहे की, तुम्ही आपल्या जनावरांना पाणी पाजित नाही?

६) यासाठी की, पुरुषांबरोबर आमचे मिळणे जुळणे होऊ नये.

७) यासाठी, ते स्वत: घाटावर, पाणी पाजण्यासाठी येऊ शकत नाही.

८) ह.मूसा عليه السلام एवढा लांबचा प्रवास करुन, इजिप्तहून मदयनला पोहचले होते, खाण्या पिण्यासाठी काही नव्हते. प्रवासाचा थकवा आणि भुकेने, सुस्त झालेले होते. म्हणून जनावरांना पाणी पाजून, एका झाडाच्या सावलीखाली येऊन (अल्लाहशी) प्रार्थना करण्यात व्यस्त होऊन गेले. 'खैर' अनेक गोष्टींवर बोलले जाते, जेवणावर, चांगल्या कामांवर, शक्ती आणि सामर्थ्यावर, आणि धन संपत्तीवर (अयसरूत तफासीर) येथे त्याचा उपयोग खाण्यावर झाला आहे. म्हणजे मी यावेळी खाण्याचा गरजवंत आहे.

فَجَآءَتْهُ اِحْدٰىهُمَا تَمْشِیْ عَلَى اسْتِحْيَآءٍ ؗ قَالَتْ اِنَّ اَبِیْ يَدْعُوْكَ لِيَجْزِيَكَ اَجْرَ مَا سَقَيْتَ لَنَا ؕ فَلَمَّا جَآءَهٗ وَقَصَّ عَلَيْهِ الْقَصَصَ ۙ قَالَ لَا تَخَفْ ٚ نَجَوْتَ مِنَ الْقَوْمِ الظّٰلِمِيْنَ ﴿۲۵﴾

**इतक्यात त्या स्त्रियांमधून एक लाजत लाजत, त्यांच्याकडे चालत [१] आली, म्हणू लागली कीं, माझे वडील आपणास बोलावित आहेत; यासाठी की आपण (आमच्या जनावरांना) जे पाणी पाजले आहे, त्याची मेहनताना [२] द्यावा. जेव्हा ह.मूसा عليه السلام त्यांच्या जवळ पोहोचले, आणि त्यांना आपली सारी परिस्थिती निवेदित केली, तेव्हा ते म्हणू लागले, आता भिऊ नकोस, तू जालीम लोकांपासून सुटका मिळवून घेतलीस. [३] ㉕**

قَالَتْ اِحْدٰىهُمَا يٰۤاَبَتِ اسْتَاْجِرْهُ ؗ اِنَّ خَيْرَ مَنِ اسْتَاْجَرْتَ الْقَوِیُّ الْاَمِيْنُ ﴿۲۶﴾

**त्या दोघीपैकी, एकीने म्हटले की, पिताजी, आपण त्यांना मजुरीवर ठेऊन घ्यावे; कारण ज्यांना आपण मजुरीवर ठेवाल, त्यांच्यात सर्वात उत्तम तो आहे, जो प्रामाणिक [४] आणि मजबूत असला पाहिजे. ㉖**

قَالَ اِنِّیْۤ اُرِيْدُ اَنْ اُنْكِحَكَ اِحْدَى ابْنَتَیَّ هٰتَيْنِ عَلٰۤى اَنْ تَاْجُرَنِیْ ثَمٰنِیَ حِجَجٍ ۚ فَاِنْ اَتْمَمْتَ عَشْرًا فَمِنْ عِنْدِكَ ۚ وَمَاۤ اُرِيْدُ اَنْ اَشُقَّ عَلَيْكَ ؕ سَتَجِدُنِیْۤ اِنْ شَآءَ اللّٰهُ مِنَ الصّٰلِحِيْنَ ﴿۲۷﴾

**त्या वृध्दाने म्हटले, मी आपल्या या दोन मुली– मधून, एकीचे आपल्याशी, लग्न करुन देऊ इच्छितो. [५] या स्त्रीधनावर (मेहेर) की, आपण आठ वर्षे पर्यंत माझे कामकाज करावे. [६] होय! पण जर आपण दहा वर्षे पूर्ण कराल, तर हे आपणाकडून उपकार म्हणून आहे. मी असे मुळीच इच्छित नाही की, आपणास कोण्या कष्टांत टाकावे; [७] अल्लाहला मंजूर असेल तर, पुढे जाता, आपण मला एक भला माणूस पावाल [८] ㉗**

१) अल्लाह्ने ह. मूसा عليه السلام ची प्रार्थना मान्य करुन टाकली. आणि त्या दोघींमधून एक मुलगी, त्यांना बोलाविण्या करिता येऊन लागली. मुलीच्या लज्जेचा, कुरआनाने खास म्हणून उल्लेख केला आहे की, हा स्त्रीचा खास दागिना आहे. आणि पुरुषांसारखी लज्जा आणि पर्द्याकडून निरपेक्षता आणि निडर वृत्ती, स्त्रीकरिता शास्त्राने नापसंत आहे.

२) मुलींचे वडील कोण होते? कुरआन करीमने स्पष्टपणे कोणाचे नाव घेतले नाही. भाष्यकारांच्या बहुसंख्येने याच्याने अभिप्रेत ह. शोएब عليه السلام ला घेतले आहे. जे मदयनवाल्याकडे पाठविले गेले होते. इमाम शौकानीने पण या म्हणण्याला प्राधान्य दिले आहे, परंतु इमान इब्ने कसीर म्हणतात कीं, ह. शोएब عليه السلام चा पैगंबरीचा जमाना ह. मूसा عليه السلام च्या फार पूर्वींचा आहे. म्हणून या ठिकाणी ह. शोएब عليه السلام चा भाऊबंदातला एखादा वंशज, किंवा आणखी कोणी मनुष्य शोएब عليه السلام च्या लोकांपैकी अभिप्रेत आहे. वल्लाह् अअ्लम! तथापि ह. मूसा عليه السلام नी मुलीबरोबर जी सहानुभूती आणि उपकार केले, ते मुलींनी जाऊन आपल्या बापाला सांगून दिले. त्यामुळे बापाच्या मनांत सुध्दा इच्छा निर्माण झाली कीं, उपकाराचा बदला उपकाराने दिला जावा. किंवा त्याच्या श्रमाची मजुरीच दिली जावी.

३) म्हणजे आपल्या इजिप्तचा हाल अहवाल, आणि फिरऔनाच्या जुलूम आणि अत्याचाराचा तपशील ऐकविला. ज्यावर त्यांनी म्हटले कीं. हा इलाखा फिरऔनाच्या सत्तेच्या हद्दीच्या बाहेर आहे. म्हणून भिण्याचे कारण नाहीं. अल्लाह्ने जालीमांकडून मुक्ती प्रदान करून दिली आहे.

४) काही भाष्यकारांनी लिहले आहे कीं, बापाने मुलींना विचारले कीं, तुम्हास कशाप्रकारे माहित झाले कीं हा शक्तीमान पण आहे आणि प्रमाणिक पण. ज्यावर मुलींनी सांगितले कीं, ज्या विहीरीतून पाणी पाजले, तीवर एवढा मोठा दगड ठेवलेला असतो, की त्याला उचलण्यासाठी, दहा माणसांची आवश्यकता लागते परंतु आम्ही पाहिले कीं, या मनुष्याने तो दगड एकट्यानेच उचलून घेतला. आणि मग नंतर पुन्हा ठेवून दिला. अशाच प्रकारे जेव्हा मी त्याला बोलावून आपल्या बरोबर आणत होती, तेव्हा कारण कीं, रस्त्याचे ज्ञान मलाच होते, मी पुढे पुढे चालत होते, आणि हा मागे मागे परंतु वारा माझी चादर उडवून देत होता. तेव्हा या माणसाने म्हटले कीं, तू मागे चाल मी पुढे पुढे चालतो. यासाठी कीं माझी नजर, तुझ्या शरीराच्या कोण्या भागावर पडू नये. रस्त्याच्या दाखविण्याकरिता मागून दगडे मारून देत जा. वल्लाह् अअलम.

५) आमच्या देशांत कोण्या मुलीवाल्या कडून लग्नाच्या इच्छेचे जाहीर करणे, दोष समजला जातो. पण अल्लाह्च्या धर्मशास्त्रांत हे निंदनीय नाही. चांगल्या वर्तणुकीचा मुलगा जर मिळत असेल तर त्याच्याशी किंवा त्याच्या कुटुंबीयांशी आपल्या मुली करतां, नाते संबंधाबाबत विचारणा करणे, वाईट नाहीं, किंबहुना चांगले आणि पंसतीचे आहे. पैगंबर ﷺ च्या काळांत आणि सहाबा कराम, रिजवानल्लाह् अलैहिम अजमाईन, मध्ये सुध्दा हीच पध्दत होती.

६) याच्याने धर्म पंडितांनी, मजुरीवर लावून घेण्याबाबतीत, आधार घेतला आहे. म्हणजे, भाड्याने किंवा मजुरीवर, पुरूषाच्या सेवा प्राप्त करून घेणे योग्य आहे.

७) म्हणजे आणखी दोन वर्षाच्या सेवेत, कष्ट आणि त्रास जाणवेल, तर आठ वर्षाच्या नंतर जाण्याची परवानगी असेल.

८) भांडण करणार नाही; न त्रास देईल, तसेच सक्तीने काम होणार नाही.

قَالَ ذٰلِكَ بَيۡنِيۡ وَبَيۡنَكَ ؕ اَيَّمَا الۡاَجَلَيۡنِ قَضَيۡتُ فَلَا عُدۡوَانَ عَلَىَّ ؕ وَاللّٰهُ عَلٰى مَا نَقُوۡلُ وَكِيۡلٌ ۝٢٨

**मूसाने म्हटले, बरे तर ही गोष्ट माझ्या आणि तुमच्या दर्म्यान पक्की झाली. मी या दोन्ही मुदतीमधून, जिला इच्छील पूर्ण करुन देईल, माझ्यावर कोण्याही प्रकारची जबरदस्ती न व्हावी. (१) आम्ही हे जे काही सांगत आहोत, यावर अल्लाह साक्षी आणि कार्यसाधक आहे. (२) २८**

فَلَمَّا قَضٰى مُوۡسَى الۡاَجَلَ وَسَارَ بِاَهۡلِهٖۤ اٰنَسَ مِنۡ جَانِبِ الطُّوۡرِ نَارًا ۚ قَالَ لِاَهۡلِهِ امۡكُثُوۡۤا اِنِّىۡۤ اٰنَسۡتُ نَارًا لَّعَلِّىۡۤ اٰتِيۡكُمۡ مِّنۡهَا بِخَبَرٍ اَوۡ جَذۡوَةٍ مِّنَ النَّارِ لَعَلَّكُمۡ تَصۡطَلُوۡنَ ۝٢٩

**जेव्हा ह. मूसा. (अ.) नी मुदत पूर्ण (३) करुन घेतली; आणि आपल्या कुटुंबासह रवाना (४) झाले, तेव्हा तूर पर्वताकडे आग(शी) पाहिली, आपल्या पत्नीला म्हणाले, थांबा! मी आग पाहिली आहे. फार शक्य आहे की मी तेथून काही खबर आणेन किंवा आगीचे कोण कोलीत घेऊन येईल की कदाचित् तुम्ही शेक घेऊ शकाल २९**

فَلَمَّاۤ اَتٰٮهَا نُوۡدِىَ مِنۡ شَاطِیٴِ الۡوَادِ الۡاَيۡمَنِ فِى الۡبُقۡعَةِ الۡمُبٰرَكَةِ مِنَ الشَّجَرَةِ اَنۡ يّٰمُوۡسٰۤى اِنِّىۡۤ اَنَا اللّٰهُ رَبُّ الۡعٰلَمِيۡنَ ۝٣٠

**मग जेव्हा ते तेथे पोहोचले, तेव्हा या शुभकारक जागेत, मैदानाच्या उजवीकडच्या किनाऱ्याच्या, एका वृक्षांतून (त्यांना) आवाज देण्यात आला (५) की, हे मूसा! खचितच् मीच अल्लाह् आहे; सकल जगांचा पालनकर्ता. (६) ३०**

وَاَنۡ اَلۡقِ عَصَاكَ ؕ فَلَمَّا رَاٰهَا تَهۡتَزُّ كَاَنَّهَا جَآنٌّ وَّلّٰى مُدۡبِرًا وَّلَمۡ يُعَقِّبۡ ؕ يٰمُوۡسٰۤى اَقۡبِلۡ وَلَا تَخَفۡ اِنَّكَ مِنَ الۡاٰمِنِيۡنَ ۝٣١

**(आणि हा पण आवाज आला) की, आपली काठी टाकून दे. मग जेव्हा तिला पाहिले की, ती सापासारखी, वळवळत आहे, तेव्हा पाठ फिरवून पळाले; आणि मागे वळून पाहिले सुध्दा नाही; आम्ही म्हटले, हे मूसा! पुढे ये! भिऊ नकोस. खचित्च तू सर्व प्रकारे अभय पावलेला आहेस. (७) ३१**

१) म्हणजे आठ वर्षांनतर, किंवा दहा वर्षांनंतर, मी जाऊ इच्छील, तर माझ्याकडे आणखी राहण्याची मागणी न केली जावी.

२) हे काहींच्या जवळ शोएब عليه السلام किंवा शोएबच्या भावाच्या मुलाचे म्हणणे आहे. आणि काही जवळ हे ह. मूसा عليه السلام चे म्हणणे आहे. शक्य आहे दोघांकडून असावे. कारण कीं, अनेकवचनाचा सेगा आहे; जणू दोघांनी, या मामल्यावर अल्लाह्ला साक्षी ठरविले; आणि याच्या बरोबरच, त्यांची मुलगी आणि ह मूसा عليه السلام च्या दर्म्यान पती पत्नीचे नाते कायम होऊन गेले. बाकी तपशीलचा अल्लाह्ने उल्लेख केलेला नाही. तसे इस्लाममध्यें, दोन्ही बाजंकडून, पसंतीच्या बरोबर, लग्नाच्या मजबुतीसाठी, दोन न्यायी साक्षीदार पण आवश्यक आहेत.

३) ह इब्ने अब्बास رضي الله عنه नी या मुदतीपासून, दहा वर्षाची मुदत, अभिप्रेत धरली आहे. कारण कीं हीच पसंतीची आणि प्रिय (म्हणजे मूसा عليه السلام च्या सासऱ्यासाठी, अत्यंत चांगली आणि आवडती) होती आणि ह. मूसा عليه السلام च्या दुसऱ्यावर महेरबानी करण्याच्या वर्तणुकीने, आपल्या म्हाताऱ्या सासऱ्याच्या मनेच्छे विरुध्द करणे पसंत केले नाही.

४) याने माहित झाले कीं, पती आपल्या पत्नीला, जेथे इच्छील, तेथे नेऊ शकतो.

५) म्हणजे आवाज दरीच्या किनाऱ्याकडून येत होता. जी पश्चिमेकडून, डोंगराच्या उजव्या बाजूस होती. येथून एका वृक्षांतून, अग्नीच्या ज्वाला उंचावत होत्या ज्या वास्तविक अल्लाह्च्या प्रकाश वलयाचा नूर (तेज) होता.

६) म्हणजे हे मूसा! तुझ्याशी जो यावेळी बोलत आणि संभाषण करीत आहे, तो मी अल्लाह् आहे. सकल जगांचा पानलकर्ता

७) हा ह. मूसा عليه السلام चा तो चमत्कार आहे, जो तूर पर्वतावर, पैगंबरी प्रदान केल्यानंतर, त्यांना मिळाला. कारण कीं, चमत्कार, नेहमीच्या सवयी पेक्षा वेगळ्या मामल्याला म्हटले जाते; म्हणजे जे सर्वसाधारण सवयी, आणि उघड साधनांच्या विरुध्द असेल. असा मामला कारण कीं, अल्लाह्च्या हुकूमाने आणि मर्जीने, जाहीर होत असतो, कोण्या माणसाच्या तो अखत्यारांने नसतो.मग जरी तो अतिप्रतिष्ठीत पैगंबर, अल्लाह्च्या जवळचा कांअसेना! म्हणूनच मूसाच्या हातातील लाठी, जमिनीवर फेकल्यामुळे, धावणारी आणि फुत्कार टाकणारी, साप बनून गेली, तेव्हा ह. मूसा عليه السلام पण भिऊन गेले जेव्हा अल्लाहतआला ने सांगितले, आणि समाधान केले, तेव्हा ह. मूसा عليه السلام ची भीती दूर झाली; आणि हे स्पष्ट झाले कीं, अल्लाहतआलाने त्यांच्या सत्यतेसाठी, प्रमाण म्हणून हा चमत्कार त्यांना प्रदान केला आहे.

| | |
|---|---|
| اُسۡلُكۡ يَدَكَ فِىۡ جَيۡبِكَ تَخۡرُجۡ بَيۡضَآءَ مِنۡ غَيۡرِ سُوۡٓءٍ وَّاضۡمُمۡ اِلَيۡكَ جَنَاحَكَ مِنَ الرَّهۡبِ فَذٰنِكَ بُرۡهَانٰنِ مِنۡ رَّبِّكَ اِلٰى فِرۡعَوۡنَ وَمَلَا۟ئِهٖ ؕ اِنَّهُمۡ كَانُوۡا قَوۡمًا فٰسِقِيۡنَ ﴿۳۲﴾ | **आपल्या हाताला आपल्या गळपट्टीत घाल, तो कुठल्याही आजाराशिवाय, चमकणारा होऊन निघेल, बिलकुल पांढरा शुभ्र.[१] आणि भीतीपासून (वाचण्यासाठी,) आपल्या बाजू आपल्याकडे आखडून [२] घे. मग हे दोन्ही चमत्कार तुझ्याकरिता, तुझ्या पालनकर्त्याकडून आहेस, फिरऔन आणि त्याच्या लोकांकडे; खचित्च ते सर्वच्या सर्व, आज्ञाभंजक लोक आहेत.[३] ३२** |
| قَالَ رَبِّ اِنِّىۡ قَتَلۡتُ مِنۡهُمۡ نَفۡسًا فَاَخَافُ اَنۡ يَّقۡتُلُوۡنِ ﴿۳۳﴾ | **मूसाने म्हटले, हे माझ्या पालनकर्त्या! मी त्यांचा एक माणूस ठार मारुन टाकला होता; आता मला भीती वाटते की, ते मला पण ठार मारुन टाकतील.[४] ३३** |
| وَاَخِىۡ هٰرُوۡنُ هُوَ اَفۡصَحُ مِنِّىۡ لِسَانًا فَاَرۡسِلۡهُ مَعِىَ رِدۡاً يُّصَدِّقُنِىۡۤ ۖ اِنِّىۡۤ اَخَافُ اَنۡ يُّكَذِّبُوۡنِ ﴿۳۴﴾ | **आणि माझा भाऊ हारुन, हा माझ्या पेक्षा जास्त, स्पष्ट बोलणारा आहे; तर तू त्याला पण माझा मददगार बनवून,माझ्या बरोबर पाठीव,[५] की, तो माझी सत्यता पटवीन. मला तर अंदेशा वाटतो की, ते सर्व मला खोटे ठरवतील.. ३४** |
| قَالَ سَنَشُدُّ عَضُدَكَ بِاَخِيۡكَ وَنَجۡعَلُ لَـكُمَا سُلۡطٰنًا فَلَا يَصِلُوۡنَ اِلَيۡكُمَا ۛۚ بِاٰيٰتِنَاۤ ۛۚ اَنۡتُمَا وَمَنِ اتَّبَعَكُمَا الۡغٰلِبُوۡنَ ﴿۳۵﴾ | **अल्लाहतआलाने म्हटले, आम्ही तुझ्या भावाबरोबर तुझ्या बाजू भक्कम करून टाकू;[६] आणि तुम्हा उभयतास असे वर्चस्व देऊ की, फिरऔनाचे लोक तुमच्या पावेतो पोहचूच शकणार नाहीत.[७] आमच्या चमत्कारांमुळे, तुम्ही दोघे, आणि तुमचे अनुकरण करणारेच प्रबळ[८] राहतील. ३५** |

१) हा 'यदे बय्‌जाअ' दुसरा चमत्कार होता,जो त्यांना देण्यात आला.

२) लाठीचे अजगर बनून जाण्याच्या स्वरूपांत, जी भीती ह. मूसा عليه السلام ला वाटत होती याचा उपाय दाखवून दिला कीं, आपल्या बाजू आपल्याकडे आखडून घेत जा, म्हणजे बगलेत, दाबून घेत जा. ज्याने भीती जात राहील. काही भाष्यकार म्हणतात कीं, हे सर्वसाधारण आहे कीं, जेव्हा कोणाला भीती वाटेल, तर असे करण्याने भीती दूर होऊन जाईल. इमाम इब्ने कसीर म्हणतात की, ह. मूसा عليه السلام च्या अणुकरणांत, जो मनुष्य पण, भीतीच्या वेळीं, आपल्या छातीवर हात ठेवील, तर त्याच्या मनातून भीती चालली जाईल. किंवा कमीत कमी हलकी होऊन जाईल. इन्शा अल्लाह्!

३) म्हणजे फिरऔन आणि त्याच्या लोकांसमोर, हे दोन्ही चमत्कार, आपल्या सत्यतेला प्रमाण म्हणून सादर करा हे लोक अल्लाह्च्या आज्ञापालनांतून निघून गेले आहेत. आणि अल्लाह्च्या धर्माचे विरोधक आहेत.

४) हा तो धोका होता, जो खरोखर मूसा عليه السلام च्या जीवावर बेतणारा होता; कारण कीं, त्यांच्या हातून एका किब्त्याचा खून होऊन चुकला होता.

५) इस्राईली रिवायतींनुसार, ह. मूसा عليه السلام च्या जिभेत अडखळणे होते. ज्याचे कारण हे सांगण्यात आले आहे की, हे मूसा عليه السلام च्या समोर, आगीचे अंगारे आणि खजुर किंवा मोती, ठेवण्यात आले, तेव्हा त्यांनी विस्तव उचलून तोंडात ठेवून घेतला होता. ज्यामुळे, त्यांची जीभ जळून गेली होती. हे कारण खरे आहे किंवा नाही; तथापि कुरआन करीमच्या या स्पष्ट अर्थाच्या महावाक्या (नस्स) ने, हे तर सिध्द आहे की, ह. मूसा عليه السلام च्या तुलनेत, ह हारून عليه السلام चांगले वक्ते होते. आणि ह. मूसा عليه السلام च्या जिभेत गांठ होती. जिला उघण्याची दुआ त्यांनी पैगंबरी बहाल झाल्यानंतर केली. 'रिद्‌अन्' चा अर्थ आहे, मदतनीस व मददगार, समर्थन करणारा, म्हणजे , ह. हारून عليه السلام आपल्या सुंदर वक्तव्याने मला मदत आणि पुष्टी देतील.

६) म्हणजे मूसा عليه السلام ची दुआ मान्य करून घेण्यांत आली; आणि त्यांच्या शिफारशीवर, ह. हारून عليه السلام ला पण पैगंबरी बहाल करून, त्यांचा साथी आणि मददगार बनवून देण्यांत आले.

७) म्हणजे आम्ही तुमचे संरक्षण करू, फिरऔन आणि त्याचे लोक, तुमचे काही बिघडवू शकणार नाहीत.

८) हा तोच विषय आहे, जो कुरआन करीममध्यें, अनेक ठिकाणी वर्णन केला गेला आहे. उदाहरणार्थ सू.माइदः- ६७, सू.अहजाब - ३९, सू.मुजादिला - २१, सू.मोमीन-५१,५२

فَلَمَّا جَآءَهُم مُّوسَىٰ بِـَٔايَٰتِنَا بَيِّنَٰتٍ قَالُوا۟ مَا هَٰذَآ إِلَّا سِحْرٌ مُّفْتَرًى وَمَا سَمِعْنَا بِهَٰذَا فِىٓ ءَابَآئِنَا ٱلْأَوَّلِينَ ﴿٣٦﴾

**मग जेव्हा मूसा, आमचे दिलेले स्पष्ट चमत्कार घेऊन, त्यांच्याजवळ पोहचले, तेव्हा ते म्हणू लागले कीं, ही तर निव्वळ घडवलेली जादू आहे. आम्ही आपल्या पूर्वीच्या वाडवडिलांच्या काळांत, कधी, हे ऐकले नाही**[१] ३६

وَقَالَ مُوسَىٰ رَبِّىٓ أَعْلَمُ بِمَن جَآءَ بِٱلْهُدَىٰ مِنْ عِندِهِۦ وَمَن تَكُونُ لَهُۥ عَٰقِبَةُ ٱلدَّارِ ۖ إِنَّهُۥ لَا يُفْلِحُ ٱلظَّٰلِمُونَ ﴿٣٧﴾

**आणि ह. मूसा عليه السلام म्हणू लागले, माझा पालनकर्ता त्याला खूप जाणतो, जो त्याच्या जवळून सत्यधर्म घेऊन आला आहे;**[२] **आणि ज्याच्या करिता परलोकाचा (चांगला) परिणाम होत असतो.**[३] **खचित्‌च अन्यायकारी लोकांचे भले होणार नाही.**[४] ३७

وَقَالَ فِرْعَوْنُ يَٰٓأَيُّهَا ٱلْمَلَأُ مَا عَلِمْتُ لَكُم مِّنْ إِلَٰهٍ غَيْرِى فَأَوْقِدْ لِى يَٰهَٰمَٰنُ عَلَى ٱلطِّينِ فَٱجْعَل لِّى صَرْحًا لَّعَلِّىٓ أَطَّلِعُ إِلَىٰٓ إِلَٰهِ مُوسَىٰ وَإِنِّى لَأَظُنُّهُۥ مِنَ ٱلْكَٰذِبِينَ ﴿٣٨﴾

**आणि फिरऔन म्हणू लागला, हे दरबार मंडळानो! मी तर आपल्या शिवाय कोणाला, तुमचा उपास्य समजत नाही; आणि हे हामान! एक तू माझ्या करीतां, मातीला आगीने भाज; मग माझ्या**[५] **करता एक महाल बांध. तेव्हा मी मूसाच्या उपास्याला डोकावून पाहावे.**[६] **त्याला मी तर लबाडापैकी समजतो.**[७] ३८

وَٱسْتَكْبَرَ هُوَ وَجُنُودُهُۥ فِى ٱلْأَرْضِ بِغَيْرِ ٱلْحَقِّ وَظَنُّوٓا۟ أَنَّهُمْ إِلَيْنَا لَا يُرْجَعُونَ ﴿٣٩﴾

**आणि त्याने आणि त्याच्या लष्करांनी विनाकारण, मुलुखांत गर्व केला;**[८] **आणि ते असे समजले की, ते आमच्याकडे परतवले जाणारच नाही.** ३९

१) म्हणजे हे आवाहन की, ब्रम्हांडामध्ये, फक्त एकच अल्लाह्, याच्या लायक आहे की, त्याची उपासना केली जावी, ही आमच्यासाठी बिल्कुल नवी गोष्ट आहे. ही न आम्ही ऐकली आहे, न आमचे वाडवडील या एकेश्वरवादाशी परिचित होते. मक्केच्या मुशरिकांनी सुध्दा नबी ﷺ च्या बाबतीत म्हटले होते, ''याने तर सर्व उपास्यांना (संपवून) एकच उपास्य बनवून दिला आहे? ही तर फारच विचित्र गोष्ट आहे.'' (सू.सॉद- ५)

२) म्हणजे माझ्याहून आणि तुमच्याहून जास्त हिदायतला जाणणारा अल्लाह् आहे; म्हणून जी गोष्ट अल्लाह्कडून येईल, ती बरोबर असेल की, तुमची आणि तुमच्या वाडवडिलांची?

३) चांगल्या परिणामाने अभिप्रेत, परलोकांत अल्लाह्ची प्रसन्नता, आणि त्याच्या दया आणि क्षमेला पात्र बनून जाणे आहे. आणि 'हक' ची मागणी करणे फक्त तौहीद वाल्यांच्याच (एकेश्वर वाद्यांच्याच) वाट्याला येईल.

४) जालीम ने अभिप्रेत, मुशरिक आणि काफिर आहेत. कारण कीं जुलुमाचा अर्थ आहे, कोण्या वस्तुला तिच्या मूळ ठिकाणाहून हलवून, कोण्या आणखी ठिकाणी ठेवून देणे. मुशरिक सुध्दा कारण कीं, उपास्यत्वाच्या स्थानी, अशा लोकांना बसवून देतात, जे याला पात्र नसतात. अशाप्रकारे काफिर सुध्दा, अल्लाह्च्या खऱ्या स्थानापासून अपरिचितच राहतात. म्हणून हे लोक सर्वांत जास्त जालीम असतात. आणि हे सफलतेपासून म्हणजे परलोकांत अल्लाह्च्या दये आणि क्षमेपासून वंचित राहतील. या महावाक्याने पण ठाऊक झाले कीं, खरी सफलता, परलोकातीलच सफलता आहे. इहलोकांत सुसंपन्नता, आणि धन व साधन सामुग्रीची विपुलता खरी सफलता नाहीं यासाठी कीं, ही तात्कालिक सफलता, कुफ्र आणि शिर्कवाल्यांना पण, इहलोकांत मिळून जाते. परंतु अल्लाह्तआला, त्यांना सफलता देत नाही, असे सांगत आहे. ज्याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं, खरी सफलता, परलोकातीलच सफलता आहे. न की, जगातली, थोड्या दिवसांची तात्कालीक, सुसंपन्नता आणि विपुलता.

५)म्हणजे मातीला आगीत भाजून, विटा तयार करून; हामान, फिरऔनाचा मंत्री, सल्लागार आणि त्याच्या मामल्यांची व्यवस्था करणारा होता.

६) म्हणजे एक उंच आणि मजबूत महाल तयार कर, ज्यावर चढून मी, आकाशावर हे पहावू शकावे कीं, तेथे माझ्याशिवाय आणखी कोणी उपास्य आहे?

७) म्हणजे मूसा, जो हा दावा करीत आहे, की आकाशांवर अल्लाह् आहे, जो साऱ्या ब्रम्हांडाचा पालनकर्ता आहे, मी तर त्याला लबाड समजतो.

८) जमिनीने अभिप्रेत, इजिप्तची भूमी आहे; जेथे फिरऔन सत्ताधीश होता.आणि गर्व करण्याचा अर्थ, कुठल्याही पात्रते शिवाय, आपल्याला मोठे समजणे आहे. म्हणजे त्यांच्याजवळ कोणी प्रमाण असे नव्हते, जे मूसा عليه السلام ची प्रमाणे आणि चमत्कार, यांचे खंडन करू शकेल. परंतु गर्व किंबहुना शत्रुत्व करण्याचे प्रदर्शन करीत, त्यांनी अडेलतट्टूपणा आणि नकार देण्याचा मार्ग अनुसरला.

| | |
|---|---|
| فَأَخَذْنٰهُ وَجُنُوْدَهٗ فَنَبَذْنٰهُمْ فِى الْيَمِّ ۚ فَانْظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الظّٰلِمِيْنَ ۝٤٠ | सरशेवटी आम्ही त्याला आणि त्याच्या लष्करांना पकडून घेतले आणि समुद्रांत बुडवून टाकले. आता [१] पहा की, त्या गुन्हेगारांचा परिणाम कसा काय झाला? ४० |
| وَجَعَلْنٰهُمْ اَئِمَّةً يَّدْعُوْنَ اِلَى النَّارِ ۚ وَيَوْمَ الْقِيٰمَةِ لَا يُنْصَرُوْنَ ۝٤١ | आणि आम्ही त्यांना असे पुढारी बनवून दिले कीं, त्यांनी लोकांना नगकाग्नीकडे बोलवावे. [२] आणि कयामतच्या दिवशी त्यांची मुळीच मदत केली जाणार नाही. ४१ |
| وَاَتْبَعْنٰهُمْ فِىْ هٰذِهِ الدُّنْيَا لَعْنَةً ۚ وَيَوْمَ الْقِيٰمَةِ هُمْ مِّنَ الْمَقْبُوْحِيْنَ ۝٤٢ | आणि आम्ही या जगात सुध्दा त्यांच्यामागे आपला शाप लाउन दिला; आणि कयामतच्या दिवशी सुध्दा ते वाईट हाल होणाऱ्या लोकांमधून असतील. [३] ४२ |
| وَلَقَدْ اٰتَيْنَا مُوْسَى الْكِتٰبَ مِنْۢ بَعْدِ مَاۤ اَهْلَكْنَا الْقُرُوْنَ الْاُوْلٰى بَصَآئِرَ لِلنَّاسِ وَهُدًى وَّرَحْمَةً لَّعَلَّهُمْ يَتَذَكَّرُوْنَ ۝٤٣ | आणि या पूर्वीच्या काळांतील लोकांना नष्ट केल्यानंतर, आम्ही मूसाला असे पुस्तक दिले; [४] जे लोकांकरिता, प्रमाण आणि मार्गदर्शन, आणि रहमत होऊन आले होते; [५] कारण की त्यांनी, बोध घ्यावा. [६] ४३ |
| وَمَا كُنْتَ بِجَانِبِ الْغَرْبِىِّ اِذْ قَضَيْنَاۤ اِلٰى مُوْسَى الْاَمْرَ وَمَا كُنْتَ مِنَ الشّٰهِدِيْنَ ۝٤٤ | आणि 'तूर' च्या पश्चिमेकडे जेव्हा आम्ही मूसा عليه السلام ला हुकूम आणि आदेशांचे 'वह्य' पोहचविले होते. त्यावेळी न तर आपण हजर होतास, न तर आपण पहाणाऱ्यांमधून होतास. [७] ४४ |
| وَلٰكِنَّاۤ اَنْشَاْنَا قُرُوْنًا فَتَطَاوَلَ عَلَيْهِمُ الْعُمُرُ ۚ وَمَا كُنْتَ ثَاوِيًا فِىْۤ اَهْلِ مَدْيَنَ تَتْلُوْا عَلَيْهِمْ اٰيٰتِنَا ۙ وَلٰكِنَّا كُنَّا مُرْسِلِيْنَ ۝٤٥ | आणि परंतु आम्ही पुष्कळशा उम्मती निर्माण केल्या [८] ज्यांच्यावर बराच काळ लोटला; [९] आणि न आपण मदयनच्या रहिवाश्यांमधून होतास; [१०] की त्यांच्यासमोर आमच्या महावाक्यांचे पठण करतां, किंबहुना आम्हीच पैगंबरांना पाठविणारे राहिलो. [११] ४५ |
| وَمَا كُنْتَ بِجَانِبِ الطُّوْرِ اِذْ نَادَيْنَا وَلٰكِنْ رَّحْمَةً مِّنْ رَّبِّكَ لِتُنْذِرَ قَوْمًا مَّاۤ اَتٰىهُمْ مِّنْ نَّذِيْرٍ مِّنْ قَبْلِكَ لَعَلَّهُمْ يَتَذَكَّرُوْنَ ۝٤٦ | आणि न तर आपण 'तूर' कडे होतास, जेव्हा की, आम्ही आवाज दिला; [१२] किंबहुना ही तर तुझ्या पालनकर्त्याकडून एक रहमत आहे; [१३] यासाठी की, आपण त्या लोकांना सावध करून द्यावे, ज्यांच्याजवळ आपल्यापूर्वी कोणी भिवविणारा पोहचला नाही. की कदाचित् [१४] ते बोध घेतील. ४६ |
| وَلَوْلَاۤ اَنْ تُصِيْبَهُمْ مُّصِيْبَةٌۢ بِمَا قَدَّمَتْ اَيْدِيْهِمْ فَيَقُوْلُوْا رَبَّنَا لَوْلَاۤ اَرْسَلْتَ اِلَيْنَا رَسُوْلًا فَنَتَّبِعَ اٰيٰتِكَ وَنَكُوْنَ مِنَ الْمُؤْمِنِيْنَ ۝٤٧ | जर ही गोष्ट नसती, की, त्यांना त्यांच्या आपल्या हाताने, पुढे पाठविलेल्या कर्मांमुळे, कोणी संकट पोहचते तेव्हा हे, म्हणून पडले असते, हे आमच्या पालनकर्त्या तू आम्हाकडे कोणी पैगंबर का म्हणून पाठविला नाहीं? की, आम्ही तुझ्या महावाक्यांचे अनुकरण करतो, आणि ईमानवाल्यांमधून होऊन [१५] जातो. ४७ |
| فَلَمَّا جَآءَهُمُ الْحَقُّ مِنْ عِنْدِنَا قَالُوْا لَوْلَاۤ اُوْتِىَ مِثْلَ مَاۤ اُوْتِىَ مُوْسٰى ۚ اَوَلَمْ يَكْفُرُوْا بِمَاۤ اُوْتِىَ مُوْسٰى مِنْ قَبْلُ ۚ قَالُوْا سِحْرٰنِ تَظٰهَرَا ۚ وَقَالُوْۤا اِنَّا بِكُلٍّ كٰفِرُوْنَ ۝٤٨ | आणि मग जेव्हा यांचे जवळ आमच्या कडून सत्य येऊन पोहचले, तेव्हा म्हणू लागले कीं, याला ते का दिले गेले नाही, जसे मूसा (अ) ला दिले गेले होते. [१६] बरे! तर जे काही मूसा (अ) ला दिले गेले होते, त्याला लोकांनी नाकारले [१७] नव्हते? साफ सांगून टाकले होते की, हे उभयंता जादूगीर आहेत; जे एक दुसऱ्याचे मददगार आहेत. आणि आम्ही तर या सर्वांना नाकारणारे आहोत. [१८] ४८ |

१) म्हणजे जेव्हा यांचे नाकारणे आणि शिरजोरी, मर्यादेपलीकडे वाढून गेली, आणि कोण्याप्रकारे पण ते ईमान आणण्यांस तयार झाले नाही, तेव्हा सरशेवटी, एका सकाळी आम्ही, त्यांना समुद्रांत बुडवून टाकले. (ज्याचा तपशील सू. शुअराअ मध्ये येऊन चुकला आहे.)

२) म्हणजे जे पण यांच्यानंतर असे लोक होतील, जे अल्लाहच्या एकेश्वरवादा (तौहीद)चे, किंवा त्याच्या अस्तित्वाला नाकारणारे असतील, तर त्यांचा पेशवा, व पुढारी हेच फिरऔनी समजले जातील, जे नरकाग्नीकडे बोलाविणारे आहेत,

३) म्हणजे जगांत पण, फजिती आणि अप्रतिष्ठा, त्यांच्या दैवी आली, आणि परलोकांत पण, ते वाईट अवस्थेत असतील म्हणजे चेहरे काळे, आणि डोळे निळे, जसे की, नरकाग्नीवासियांच्या चर्चेत येते.

४) म्हणजे फिरऔन आणि त्याचे लोक, किंवा नूह, आद व समूद वगैरे लोकांच्या नष्ट झाल्यानंतर, मूसा عليه السلام ला.

पुस्तक (तौरात) दिले.
५) ज्यामुळे त्यांनी सत्याला ओळखून घ्यावे. आणि त्याचा अंगीकार करावा. आणि अल्लाहच्या दयेला पात्र ठरून जावे.
६) म्हणजे अल्लाहच्या देणग्यांचे आभार माणावे, आणि अल्लाहवर ईमान आणावे. आणि त्याच्या पैगंबराचे अनुकरण करावे; जे त्यांना भलाईकडे आणि खऱ्या सफलतेकडे बोलवितात.
७) म्हणजे जेव्हा आम्ही तूर पर्वतावर मूसाशी संभाषण केले, आणि त्याला पैगंबरी आणि वह्य बहाल केले, हे मुहम्मद! ﷺ आपण न तेथे उपस्थित होता. आणि न ते दृष्य पहाणाऱ्यांमधून होतास. परंतु या अदृष्टाच्या त्या बातम्या आहेत, ज्या आम्ही वह्याच्या मार्फत आपल्याला सांगत आहोत, जे या गोष्टीचे प्रमाण आहे की, आपण अल्लाहचा खरा पैगंबर आहेस कारण कीं न तर आपण या गोष्टी कोणाकडून शिकल्या आहेत, न आपण प्रत्यक्ष त्यांचा अनुभव घेतला आहेस. हा विषय आणखी पण अनेक ठिकाणी सांगण्यात आला आहे. उदाहरणार्थ, सू. आले इमरान -४४, सू. ताहा - ९९ सू. हूद-४९,१००, सू. यूसुफ-१०२, वगैरे
८) 'कुरून' 'कर्न' चे अनेक वचन आहे, काळ परंतु येथे 'उम्मती' च्या अर्थांत आहे. म्हणजे हे मोहम्मद! ﷺ तुमच्यांत आणि मूसा عليه السلام च्या दर्म्यान जो काळ आहे, यांच्यात आम्ही कित्येक उम्मती निर्माण केल्यात.
९) म्हणजे, चालल्या गेलेल्या दिवसांपासून, धर्मशास्त्र आणि आदेशपण बदलून गेलेत. आणि लोक पण धर्माला विसरून गेले. ज्यामुळे त्यांनी, अल्लाहच्या हुकूमांना पाठीमागे टाकून दिले; आणि त्याच्याशी केलेल्या कराराला विसरून गेले. आणि अशा प्रकारे याची आवश्यकता निर्माण झाली कीं, एका नव्या पैगंबराला पाठविले जावे. किंवा हा अर्थ आहे कीं, बराच काळ लोटल्यामुळे, अरब लोक पैगंबरीला अजिबात विसरून गेले. म्हणून त्यांना आपल्या पैगंबरीवर आश्चर्य वाटत आहे आणि तिला मानावयास ते तयार नाहीत.
१०) ज्यामुळे, स्वत: तुम्हासच, या घटनेचा तपशील कळून गेला असता.
११) आणि याच तत्त्वाने, आम्ही आपणांस पैगंबर बनवून पाठविले आहे. आणि मागच्या परिस्थिती, आणि घटना आपणांस कळवीत आहोत.
१२) म्हणजे जर आपण सत्य सत्य खरे पैगंबर नसता, तर मूसा عليه السلام च्या या घटनेचे काही ज्ञान पण आपणास झाले नसते.
१३) म्हणजे आपले हे ज्ञान, प्रत्यक्ष अनुभवणे, आणि वारंवार घोकण्याचा, परिणाम नाही, किंबहुना आपल्या पालनकर्त्याची रहमत आहे कीं, त्याने आपणांस पैगंबर बनविले आणि 'वह्य' बहाल केले.
१४) याच्याने अभिप्रेत मक्का निवासी आणि अरबी लोक आहेत; ज्यांच्याकडे नबी ﷺ च्या पूर्वी, कोणी पैगंबर आला नाही. कारण की ह. इब्राहीम عليه السلام च्या नंतर, पैगंबरीची शृंखला, इब्राहीम عليه السلام च्या घराण्यांतच राहिली; आणि पैगंबरांचे पाठविणे, बनीइस्राईल कडेच होत राहिले. बनी इस्माईल म्हणजे अरबांमध्ये नबी ﷺ, पहिले पैगंबर होते. आणि पैगंबरीच्या शृंखलेला संपविणारे होते. त्यांच्याकडे पैगंबर पाठविण्याची आवश्यकता यासाठी समजली गेली नसावी की दुसऱ्या पैगंबराचे आवाहन आणि त्यांचा संदेश, त्यांना पोहचत राहीला असावा. कारण की, याच्याशिवाय, त्यांच्याकरिता, कुफ्र व शिर्कवर जमून रहाण्याची सबब, आढळून येईल.आणि ही सबब अल्लाहने कोणासाठी बाकी ठेवलेली नाही.
१५) म्हणजे यांच्या या सबबीला संपविण्याकरिता, आम्ही आपणांस त्यांच्याकडे पैगंबर बनवून पाठविले आहे. कारण की, बऱ्याच काळाच्या लोटल्यामुळे, मागील पैगंबरांचे शिकवण बिघडून, आणि त्यांचे आवाहन विसरून जाऊन चुकले आहे; आणि अशा परिस्थिती, कोण्या नवीन पैगंबराच्या आवश्यकतेला कारणीभूत होत असतात. हेच कारण आहे कीं, अल्लाहतआलाने, शेवटच्या काळांतील पैगंबर ह. मोहम्मद मुस्तफा ﷺ ची शिकवणी (कुरआन व हदीस)ला बदलून जाण्यापासून व बदल जाण्यापासून व बदल व हेरफेर होण्यापासून सुरक्षित ठेवले आहे. आणि अशी व्यवस्था करून दिली आहे, ज्यामुळे आपले ﷺ आवाहन जगाच्या कोना कोपऱ्यांत पोहचून गेले आहे. आणि सतत पोहचत राहीले आहे. कारण की, कोण्या नव्या पैगंबराची, आवश्यकताच बाकी राहू नये. आणि जो मनुष्य या ''आवश्यकते'' चा दावा करीत, पैगंबरीचे ढोंगे रचतो, तो लबाड आणि दज्जाल आहे.
१६) म्हणजे मूसा عليه السلام कडून चमत्कार, जसे लाठीचे साप बनून जाणे आणि हाताचे चमकणे, वगैरे.
१७) म्हणजे त्यांना हवे असलेले चमत्कार, जर दाखवून दिले जातील, तर काय फायदा? ज्यांना ईमान आणणे नाही, ते प्रत्येक प्रकारच्या निशाण्या पाहून सुध्दा, ते ईमानापासून वंचित राहतील. काय ह.मूसा عليه السلام चे चर्चित चमत्कार पाहून, फिरऔनी मुसलमान होऊन गेले होते? त्यांनी, त्यांना नाकारले नव्हते? किंवा 'यकफुरु' चा जमीर, मक्केच्या कुरैशींकडे आहे. काय त्यांनी, मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि सल्लमच्या पैगंबरी पूर्वी, मूसा عليه السلام ला नाकारले नाही?
१८) पहिल्या भावार्थाच्या अनुषंगाने, दोघांनी अभिप्रेत ह. मूसा व हारुन عليه السلام होतील आणि सिहरान, जादुगीरांच्या अर्थात होईल आणि दुसऱ्या भावार्थांत, याच्याने कुरआन आणि तौरात अभिप्रेत होतील, म्हणजे दोन्ही जादू आहेत. जे एक दुसऱ्याचे मददगार आहेत. आणि आम्ही सर्वांचे, म्हणजे मूसा عليه السلام व मोहम्मद (ﷺ) ला न मानणारे आहोत. (फत्हुल कदीर)

قُلْ فَأْتُوا بِكِتٰبٍ مِّنْ عِنْدِ اللّٰهِ هُوَ أَهْدٰى مِنْهُمَآ أَتَّبِعْهُ إِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿٤٩﴾

**(आपण) सांगून द्या की, जर तुम्ही खरे आहात तर तुम्ही सुध्दा, अल्लाह्‌जवळून, कोणी असे पुस्तक घेऊन या, जे या दोहोंपेक्षा जास्त हिदायतवाले असतील, मी त्याचे अनुकरण करेन.** (१) ४९

فَإِنْ لَّمْ يَسْتَجِيْبُوْا لَكَ فَاعْلَمْ أَنَّمَا يَتَّبِعُوْنَ أَهْوَآءَهُمْ ۚ وَمَنْ أَضَلُّ مِمَّنِ اتَّبَعَ هَوٰىهُ بِغَيْرِ هُدًى مِّنَ اللّٰهِ ۚ إِنَّ اللّٰهَ لَا يَهْدِى الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ﴿٥٠﴾

**मग जर हे तुझे न मानतील,** (२) **तर तू विश्वास ठेव, की हे फक्त आपल्या मनेच्छेचे अनुकरण करीत आहेत. आणि याच्या पेक्षा जास्त बहकलेला कोण आहे? जो आपल्या मनोकामनेच्या मागे पडलेला असेल,** (३) **अल्लाह्‌च्या मार्गदर्शनाशिवाय; नि:संशय, अल्लाह्‌तआला जालीम लोकांना मार्ग दाखवित नसतो.** (४) ५०

وَلَقَدْ وَصَّلْنَا لَهُمُ الْقَوْلَ لَعَلَّهُمْ يَتَذَكَّرُوْنَ ﴿٥١﴾

**आणि आम्ही बरोबर, एका मागून एक, लोकांकरिता आपले पुस्तक पाठवीत राहीलो,** (५) **की त्यांनी बोध घ्यावा.** (६) ५१

الَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ مِنْ قَبْلِهٖ هُمْ بِهٖ يُؤْمِنُوْنَ ﴿٥٢﴾

**ज्यांना आम्ही याच्यापूर्वी पुस्तक दिले, ते तर यावर पण ईमान ठेवतात.** (७) ५२

وَإِذَا يُتْلٰى عَلَيْهِمْ قَالُوْٓا اٰمَنَّا بِهٖٓ إِنَّهُ الْحَقُّ مِنْ رَّبِّنَآ إِنَّا كُنَّا مِنْ قَبْلِهٖ مُسْلِمِيْنَ ﴿٥٣﴾

**आणि जेव्हा याची महावाक्ये त्यांच्याजवळ वाचली जातात, तेव्हा ते सांगून टाकतात कीं, यावर आमच्या पालनकर्त्याकडून आणि सत्य असण्यावर, आमचे ईमान आहे. आम्ही तर याच्यापूर्वीच आज्ञाधारक आहोत.** (८) ५३

१) म्हणजे जर तुम्ही या दाव्यात खरे आहात की, कुरआनमजीद आणि तौरात दोन्ही जादू आहेत; तर तुम्ही अल्लाहचे आणखी कोणी पुस्तक सादर करून द्या; जे यांच्यापेक्षा जास्त हिदायतवाले असेल; मी त्याचे अनुकरण करून घेईन; कारण मी तर हिदायतचा इच्छूक आणि तिचे अनुकरण करणारा आहे.

२) म्हणजे कुरआन आणि तौरात पेक्षा जास्त हिदायतवाले पुस्तक सादर न करू शकले आणि खचितच्च करू शकणार नाहीं.

३) म्हणजे अल्लाह्‌कडून अवतरीत झालेली हिदायत सोडून, मनेच्छेचे अनुकरण करणे हे सगळयांत मोठे बहकणे आहे. आणि या अनुषंगाने, हे मक्केचे कुरैश, सगळयांत जास्त बहकलेले आहेत, जे याचीच पुनरावृत्ती करीत आहेत.

४) यामध्ये अल्लाह्‌च्या याच सुन्नत (पध्दती) चे वर्णन आहे, जी जालीम लोकांसाठी, त्याचे जवळ नक्की आहे, कीं ते हिदायतपासून वंचित राहतात. यासाठी कीं, पैगंबरांना लबाड ठरविणे, अल्लाह्‌च्या महावाक्यांशी दुर्लक्ष, आणि सतत होण्याची कुफ्र व हटधर्मी, असा गुन्हा आहे कीं, ज्यामुळे सत्याला कबूल करण्याची लायकी, आणि परिणाम कारक क्षमता, संपून जाते. यांच्यानंतर मनुष्य जुलूम आणि पाप, आणि कुफ्र आणि शिर्कच्या अंध:कारातांच भटकत फिरतो. त्याच्या नशिबी इमानाचा प्रकाश नसतो.

५) म्हणजे एका पैगंबरानंतर दुसरा पैगंबर, एका पुस्तकानंतर दुसरे पुस्तक, आम्ही पाठवीत राहिलो. आणि अशाप्रमाणे क्रमश: सतत आम्ही आपली गोष्ट लोकांपर्यंत पोहचवित राहिलो.

६) उद्देश्य याचा हा होता कीं, लोकांनी मागील लोकांच्या परिणामाने भिऊन, आणि आमच्या गोष्टींपासून बोध घेऊन, इमान घेऊन यावे.

७) याच्याने अभिप्रेत ते यहूदी आहेत, जे मुसलमान होऊन गेले होते. जसे, अब्दुल्लाह बिन सलाम ﷺ, वगैरे, किंवा ते ख्रिस्ती आहेत, जे हबशा (इथोपिया) हून नबी सल्ललाहु अलैहि व सल्लमच्या सेवेत उपस्थित झाले होते, आणि आपल्या शुभ मुखाने, कुरआन करीम ऐकून, मुसलमान होऊन गेले होते.

८) हा याच हकीकतीकडे इशारा आहे, जिला कुरआन करीममध्यें, कित्येक ठिकाणी वर्णन करण्यात आला आहे कीं, प्रत्येक काळांत अल्लाह्‌च्या पैगंबरांनी, ज्या धर्माचे आवाहन केले, तो इस्लामच होता. आणि ह्या पैगंबरांच्या आवाहानावर, ईमान आणणारे, मुसलमानाच म्हणविले जात असत. यहूदी किंवा ख्रिस्ती वगैरेची नावे, लोकांची आपली स्वत:ची ठेवलेली आहेत; जी नंतर शोधली गेली. या अनुषंगाने, नबी करीम ﷺ वर ईमान आणणारे, ग्रंथधारी लोकां(यहूदी किंवा ख्रिस्त्यां)नी म्हटले कीं, आम्ही तर पूर्वीपासूनच मुसलमान म्हणवत आलो आहोत. म्हणजे मागील पैगंबरांचे अनुयायी, आणि त्यांच्यावर ईमान ठेवणारे आहोत.

أُولَٰئِكَ يُؤْتَوْنَ أَجْرَهُم مَّرَّتَيْنِ بِمَا صَبَرُوا وَيَدْرَءُونَ بِالْحَسَنَةِ السَّيِّئَةَ وَمِمَّا رَزَقْنَاهُمْ يُنفِقُونَ ﴿٥٤﴾

हे आपल्या सहनशिलतेच्या बदल्यात दुप्पट मोबदला दिले जातील [१] हे पुण्याने वाईटाचे निर्सन करतात. [२] आणि आम्ही त्यांना जे देऊन ठेवले आहे. हे पण त्यातून (परमार्थांत) देत असतात ५४

وَإِذَا سَمِعُوا اللَّغْوَ أَعْرَضُوا عَنْهُ وَقَالُوا لَنَا أَعْمَالُنَا وَلَكُمْ أَعْمَالُكُمْ سَلَامٌ عَلَيْكُمْ لَا نَبْتَغِي الْجَاهِلِينَ ﴿٥٥﴾

आणि जेव्हा निरर्थक [३] गोष्ट त्यांच्या कानावर पडते, तेव्हा तिच्या पासून अंग काढून घेतात; आणि सांगून देतात आमची कर्मे आमच्यासाठीं, आणि तुमचे कर्मे, तुमच्यासाठी तुम्हास सलाम असो! [४]आम्ही अज्ञानी लोकांच्या बरोबर (वादविवाद करु) इच्छुक नाहीत. ५५

إِنَّكَ لَا تَهْدِي مَنْ أَحْبَبْتَ وَلَٰكِنَّ اللَّهَ يَهْدِي مَن يَشَاءُ ۚ وَهُوَ أَعْلَمُ بِالْمُهْتَدِينَ ﴿٥٦﴾

आपण ज्याला इच्छाल, त्याला मार्ग दाखवू शकत नाहीं, किंबहुना अल्लाहतआलाच ज्याला इच्छितो, (त्याला) सरळ मार्ग दाखवितो; आणि सरळमार्गाला लागणाऱ्यांशी तोंच खूप वाकब आहे. [५] ५६

وَقَالُوا إِن نَّتَّبِعِ الْهُدَىٰ مَعَكَ نُتَخَطَّفْ مِنْ أَرْضِنَا ۚ أَوَلَمْ نُمَكِّن لَّهُمْ حَرَمًا آمِنًا يُجْبَىٰ إِلَيْهِ ثَمَرَاتُ كُلِّ شَيْءٍ رِّزْقًا مِّن لَّدُنَّا وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٥٧﴾

आणि (ते) म्हणू लागले, जर आम्ही, तुमच्या बरोबर राहून सन्मार्गाचे अनुकरण करू, तर आमच्या भूमीतून आमचे उच्चाटन केले जाईल; [६] काय आम्ही त्यांना, अमन व अभय आणि प्रतिष्ठेवाल्या पवित्र भूमीत जागा दिली नाही? [७] जेथे सर्व प्रकारचे फळफळादी, चालले येतात; जो आमच्याकडून आहार म्हणून [८] आहे. परंतु यांच्यातून बहुतेक काहीं जाणत नाहीत. ५७

१) सहनशिलतेने अभिप्रेत, प्रत्येक प्रकारच्या परिस्थितीत, पैगंबर लोक आणि अल्लाहची पुस्तके यावर ईमान, आणि त्यावर दृढ जमून रहाणे; पहिले पुस्तक आले तर त्यावर, याच्यानंतर दुसऱ्यावर ईमान ठेवले. पहिल्या पैगंबरावर ईमान आणले, याच्या नंतर दुसरा पैगंबर येऊन गेला, तर त्याच्यावर ईमान आणले. यांच्यासाठी दुप्पट मोबदला आहे. हदीसमध्ये सुध्दा यांचे श्रेष्ठत्व वर्णन करण्यांत आले आहे. नबी ﷺ, नी फर्माविले की, तीन माणसांसाठी दुप्पट मोबदला आहे. यांच्यात एक तो ग्रंथधारी माणूस आहे, जो आपल्या पैगंबरावर ईमान ठेवत होता, आणि मग माझ्यावर ईमान घेऊन आला (स. बुखारी, स.मुस्लिम)

२) म्हणजे वाईटाचे उत्तर वाईटाने देत नाहीत. किंबहुना माफ करून देतात, आणि दुर्लक्ष करतात.

३) येथे निरर्थक गोष्टीने अभिप्रेत, ते सर्व शिवीगाळ करणे, व धर्माची टिंगळ टवाळी करणे आहे, जे मुशरिक लोक करीत असत.

४) हा सलाम, नेहमीचा दुआ देणारा सलाम नाही, किंबहुना, गोष्ट संपविण्याचा सलाम आहे; म्हणजे आम्ही तुमच्यासारख्या अज्ञानी अडाण्यांशी वादविवाद आणि संभाषण करूंच इच्छित नाही. जसे उर्दूत पण म्हणतात, ‘जाहिलोंको दूर ही से सलाम.’ उघड आहे, सलाम ने अभिप्रेत, संभाषण बंद करणे आहे.

५) हे महावाक्य त्यावेळीअवतरीत झाले, जेव्हा नबी ﷺ चे, सहानुभूती बाळगणारे आणि दु:खांत सहभागी होणारे काका, जनाब अबु तालिबचा मृत्यू होऊ लागला तेव्हा आपण, ﷺ नी प्रयत्न केला की, काकांनी आपल्या तोंडाने एकदा, ‘लाइलाहा इल्लल्लाह’ म्हणून घ्यावे; कीं, कयामतच्या दिवशी मी अल्लाहजवळ त्यांच्याक्षमेची शिफारस करू शकावी. परंतु तेथे दुसऱ्या कुरैशच्या सरदारांच्या उपस्थितीमुळे, अबुतालीब ईमान कबूल करण्याच्या सुभाग्यापासून वंचित् राहिले. आणि कुफ्रवरच त्यांचा शेवट झाला. नबी ﷺ ला या गोष्टीचे मोठे खेद आणि दु:ख होते. या प्रसंगी अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत करून, नबी ﷺ वर हे स्पष्ट केले कीं, आपले काम फक्त प्रचार, प्रसार, आवाहन आणि मार्गदर्शन करण्याचे आहे. परंतु हिदायतच्या मार्गावरच चालवून देणे हे आमचे काम आहे. हिदायत त्यालाच मिळेल, ज्याला आम्ही हिदायत बहाल करू इच्छू न की त्याला, ज्याला आपण हिंदायतवर पहाणे पसंत कराल (स.बुखारी, स.मुस्लिम)

६) म्हणजे आम्ही जेथे आहोत, तेथे आम्हास राहू दिले जाणार नाहीं. आणि आम्हांस त्रास, दु:खाशी, किंवा विरोधकांशी युध्द आणि लढाईत व्यस्त व्हावे लागेल. ही काही काफिरांनी ईमान न आणण्याची सबब पुढे केली. अल्लाहने उत्तर दिले

७) म्हणजे यांची ही सबब सर्वथैव अयोग्य आहे. यासाठी की, अल्लाहतआलाने या शहराला, ज्यांच्यांत हे रहातात, अभय, शांती वाले बनविले आहे. जेव्हा हे शहर, त्यांच्या कुफ्र व शिर्कच्या स्थितीत, त्यांच्यासाठी अभयाचे स्थान आहे. तर काय इस्लाम कबूल केल्यानंतर त्यांच्यासाठी अभयाचे स्थान राहणार नाही?

८) हे मक्केचे ते वैशिष्ट्य आहे, ज्याचा प्रत्यक्ष अनुभव लाखो हज यात्रेकरूंआणि उमरा करणारे प्रत्येक वर्षी घेत असतात. की, मक्केत काही पिकत नसतांना, सुध्दा, फारच विपुलतेने, प्रत्येक प्रकारचे फळ, किंबहुना साऱ्या जगातील सामान तेथे मिळत असते.

وَكَمْ أَهْلَكْنَا مِن قَرْيَةٍ بَطِرَتْ مَعِيشَتَهَا ۖ فَتِلْكَ مَسَٰكِنُهُمْ لَمْ تُسْكَن مِّنۢ بَعْدِهِمْ إِلَّا قَلِيلًا ۖ وَكُنَّا نَحْنُ الْوَٰرِثِينَ ﴿٥٨﴾

**आणि आम्ही पुष्कळशा त्या वस्त्या नष्ट करून टाकल्या ज्या आपल्या सुखी समृध्द जीवनाने, गर्व करू लागल्या होत्या; या आहेत त्यांच्या राहण्याच्या जागा, ज्या यांच्यानंतर फारच कमी वाचविल्यास गेल्या[१] आणि आम्हीच आहोत सरशेटी सर्वकाही घेऊन घेणारे[२] (५८)**

وَمَا كَانَ رَبُّكَ مُهْلِكَ الْقُرَىٰ حَتَّىٰ يَبْعَثَ فِي أُمِّهَا رَسُولًا يَتْلُو عَلَيْهِمْ آيَاتِنَا ۚ وَمَا كُنَّا مُهْلِكِي الْقُرَىٰ إِلَّا وَأَهْلُهَا ظَالِمُونَ ﴿٥٩﴾

**आणि तुझा पालनकर्ता कोण्या एका वस्तीला पण त्यावेळेपर्यंत नष्ट करीत नाही, येथपावेतो की त्यांच्याच कोण्या बड्या वस्तीत, आपला कोणी पैगंबर न पाठवून देईन, जो त्यांना आमची महावाक्ये, वाचून ऐकवून देईल;[३] आणि आम्ही वस्त्यांना, त्यावेळी नष्ट करतो, जेव्हा की तेथील लोक, जुलूम आणि अत्याचारावर (आपली) कंबर कसून घेतात.[४] (५९)**

وَمَا أُوتِيتُم مِّن شَيْءٍ فَمَتَاعُ الْحَيَاةِ الدُّنْيَا وَزِينَتُهَا ۚ وَمَا عِندَ اللَّهِ خَيْرٌ وَأَبْقَىٰ ۚ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿٦٠﴾

**आणि तुम्हांस जे काही दिले गेले आहे, ते फक्त ऐहिक आयुष्याचा सामान आणि त्याचे भूषण आहे; होय! (परंतु) जे काही अल्लाह्जवळ आहे, ते फारच उत्तम आणि चिरस्थायी आहे. काय तुम्ही एवढेही समजत नाही?[५] (६०)**

أَفَمَن وَعَدْنَاهُ وَعْدًا حَسَنًا فَهُوَ لَاقِيهِ كَمَن مَّتَّعْنَاهُ مَتَاعَ الْحَيَاةِ الدُّنْيَا ثُمَّ هُوَ يَوْمَ الْقِيَامَةِ مِنَ الْمُحْضَرِينَ ﴿٦١﴾

**काय तो मनुष्य, ज्याला आम्ही उत्कृष्ट अभिवचन दिले आहे, ज्याला तो खचित्‌च मिळवणार आहे, त्या माणसासारखा होऊ शकतो? ज्याला आम्ही, ऐहिक आयुष्याचा, असाच थोडासा सुखोपभोग (नफा) देऊन दिला; मग सरशेवटी तो, कयामतच्या दिवशी, पकडून बांधून हजर केला जाईल.[६] (६१)**

وَيَوْمَ يُنَادِيهِمْ فَيَقُولُ أَيْنَ شُرَكَائِيَ الَّذِينَ كُنتُمْ تَزْعُمُونَ ﴿٦٢﴾

**आणि ज्या दिवशी अल्लाह्तआला त्यांना बोलावून विचारील की, तुम्ही ज्यांना आपल्या कल्पनेप्रमाणे माझे सरकतदार ठरवीत होते, ते कोठे आहेत?[७] (६२)**

१) हे मक्केकरांना भिवविण्यात येत आहे की, तुम्ही पाहत नाहीत कीं, अल्लाह्च्या देणग्यांनी लाभ उचलून, अल्लाह्शी कृतघ्नता करणे, आणि शिरजोरी करणाऱ्यांचा परिणाम काय झाला? आज त्यांच्या बहुतेक वस्त्या उजाड होऊन पडल्या आहेत. किंवा फक्त इतिहासाच्या पृष्ठावर त्यांचे नाव राहून गेले आहे. आणि येणारे जाणारे प्रवासीच, त्यांच्यात अल्प काळासाठी थांबले तर थांबले त्यांच्या वाईट परिणामामुळे, कोणी पण तेथे सतत रहाणे पसंत करीत नाहीं.

२) म्हणजे यांच्यातून कोणी पण शिल्लक राहिला नाही; जो त्यांच्या घरांचा, संपत्तीचा व धनाचा वारस होता.

३) म्हणजे तर्क पूर्ण करून दिल्या शिवाय, कोणाला नष्ट करीत नाहीं, 'उम्मिहा' (मोठी वस्ती, मध्यवर्ती ठिकाण) च्या शब्दाने, हे पण ठाऊक झाले कीं, प्रत्येक लहान, मोठ्या इलाख्यात पैगंबर आला नाही, किंबहुना, केंद्रीय ठिकाणी पैगंबर येत राहिले; आणि लहान इलाखे त्याच्या अंतर्गत येत राहिले आहे.

४) म्हणजे पैगंबर पाठविल्यानंतर, त्या वस्तीचे लोक ईमान न आणित, आणि कुफ्र व शिर्क वर आपला हट्ट चालू ठेवीत , तर मग त्यांना नष्ट करून टाकण्यात येई. हाच विषय सू. हूद- ११७ मध्ये सुध्दा सांगितला गेला आहे.

५) म्हणजे काय, या हकीकतीकडून पण तुम्ही अजाण आहात की हे जग आणि त्यांची भूषणे, तात्पुरतीपण आहेत, आणि क्षुल्लक पण, जेव्हांकीं, अल्लाह्तआलाने ईमानवाल्यांकरता, आपल्या जवळ ज्या देणग्या, सुखसोयी आणि सवलती, तयार करून ठेवल्या आहेत, त्या चिरस्थायी पण आहेत, आणि अति उत्तम पण. हदीसमध्ये आहे, ''अल्लाहची शपथ! इहलोक, परलोकाच्या तुलनेत असे आहे, जसे तुमच्यातून कोणी मनुष्याने, आपले बोट समुद्रांत बुडवून काढावे, त्याने पहावे कीं, समुद्राच्या तुलनेत बोटावर किती पाणी असेल? (स.मुस्लीम)

६) म्हणजे शिक्षेला आणि दु:खाला पात्र होईल. अर्थ आहे, ईमानवाले, अल्लाह्च्या अभिवचनाप्रमाणे, देणग्यांनी उपकृत आणि आज्ञाभंजक शिक्षेत ग्रस्त, काय हे दोन्ही बरोबर होऊ शकतात?

७) म्हणजे त्या मुर्त्या किंवा व्यक्ती, ज्यांना तुम्ही जगात माझ्या उपास्यत्वात पातीदार ठरवत होते, त्यांना मदतीसाठी बोलावित होते, आणि त्यांच्या नांवाने नवस फेडत होते, आज कोठे आहेत? काय ते तुमची मदत करु शकतात, आणि तुम्हांस माझ्या शिक्षेपासून सोडवू शकतात? हे कानउघाडणी म्हणून, अल्लाह्तआला त्यांना विचारील, नाही तर तेथे अल्लाह्च्या समोर कोणालाही ब्र काढण्याची हिंमत होईल? हाच विषय अल्लाह्तआलाने, सू.अन्आम आ. १४, आणि दुसऱ्या पुष्कळशा ठिकाणी, सांगितला आहे.

قَالَ الَّذِينَ حَقَّ عَلَيْهِمُ الْقَوْلُ رَبَّنَا هَٰؤُلَاءِ الَّذِينَ أَغْوَيْنَا أَغْوَيْنَاهُمْ كَمَا غَوَيْنَا ۖ تَبَرَّأْنَا إِلَيْكَ ۖ مَا كَانُوا إِيَّانَا يَعْبُدُونَ ﴿٦٣﴾

**ज्यांच्यावर गोष्ट येऊन चुकली, ते उत्तर देतील (१) की, हे आमच्या पालनकर्त्या! हेच ते आहेत, ज्यांना आम्ही बहकवून ठेविले होते; (२) आम्ही त्यांना अशा तऱ्हेने बहकविले, ज्याप्रमाणे आम्ही बहकलो होतो; (३) आम्ही तुझ्या सेवेत आपले निर्दोषत्व जाहीर करीत आहोत; (४) हे आमची उपासना करीत नव्हते. (५) (६३)**

وَقِيلَ ادْعُوا شُرَكَاءَكُمْ فَدَعَوْهُمْ فَلَمْ يَسْتَجِيبُوا لَهُمْ وَرَأَوُا الْعَذَابَ ۚ لَوْ أَنَّهُمْ كَانُوا يَهْتَدُونَ ﴿٦٤﴾

**आणि सांगण्यात येईल कीं, आपल्या पातीदारांना बोलवा; ते (६) बोलवतील, परंतु त्यांना ते उत्तरपण देणार नाहीत. आणि सर्व शिक्षेला पाहून घेतील. (७) अरेरे! हे लोक सरळ मार्गाला लागले असते, (८) (६४)**

وَيَوْمَ يُنَادِيهِمْ فَيَقُولُ مَاذَا أَجَبْتُمُ الْمُرْسَلِينَ ﴿٦٥﴾

**आणि त्यादिवशी (अल्लाहतआला) त्यांना बोलावून विचारील, तुम्ही पैगंबरांना काय उत्तर दिले? (९) (६५)**

فَعَمِيَتْ عَلَيْهِمُ الْأَنبَاءُ يَوْمَئِذٍ فَهُمْ لَا يَتَسَاءَلُونَ ﴿٦٦﴾

**मग तर त्यादिवशी, त्यांना कुठल्याच गोष्टी सुचणार नाहीत, आणि एक दुसऱ्यांना प्रश्न पण करणार नाहीत. (१०) (६६)**

فَأَمَّا مَن تَابَ وَآمَنَ وَعَمِلَ صَالِحًا فَعَسَىٰ أَن يَكُونَ مِنَ الْمُفْلِحِينَ ﴿٦٧﴾

**होय! (परंतु) जो मनुष्य तौबा करेल, ईमान आणेन, आणि सुकृत्ये करेन, (तर) खात्री आहे की, तो मुक्ती मिळविणाऱ्यांमधून होऊन जाईल. (६७)**

१) म्हणजे जे अल्लाहच्या शिक्षेला पात्र ठरुन चुकले असतील, म्हणजे शिरजोर, शैतान आणि कुफ्र व शिर्कचे आवाहक, वगैरे ते म्हणतील.

२) हा त्या जाहिल जनतेकडे इशारा आहे, ज्यांना कुफ्र आणि अज्ञानाचे चाहणारे, आणि शैतानांनी बहकविले होते.

३) म्हणजे आम्ही तर होतोच बहकलेले, परंतु त्यांना पण आपल्याबरोबर बहकवून ठेवले.

४) म्हणजे आम्ही त्यांच्यापासून अलिप्त, आणि वेगळे आहोत. आमचा यांच्याशी काही संबंध नाही. अर्थ हा आहे की, तेथे हे अधिन, आणि अधिन करणारे, चेले आणि गुरु, एक दुसऱ्याचे शत्रू होतील.

५) किंबहुना, वास्तविक ते आपल्याच मनेच्छेचे अनुकरण करीत होते. म्हणजे ते उपास्य, ज्यांची लोक जगात उपासना करीत असत, या गोष्टीपासूनच इन्कार करुन टाकतील की, लोक त्यांची उपासना करीत होते. या विषयाला कुरआन करीममध्ये, कित्येक ठिकाणी सांगण्यात आले आहे. उदाहरणार्थ, सू. अन्आम- ४१, सू.मर्यम- ८१/८२, सू.अहकाफ- ५/६, सू.अन्कबूत- २५, सू.बकर:- १६६/१६७, वगैरे.

६) म्हणजे त्यांच्याजवळ मदत मागा, ज्याप्रमाणे जगांत करीत होते. काय, ते तुमची मदत करतात? मग ते त्यांना बोलावतील; परंतु तेथे कोणालाही हिंमत होईल की, जो हे म्हणेण की होय! आम्ही तुमची मदत करीत आहोत?

७) म्हणजे त्यांना खात्री होऊन जाईन की, सर्व नरकाग्नीचे इंधन बनून जाणार आहेत.

८) म्हणजे शिक्षा पाहून घेतल्यावर, आकांक्षा करतील की, अरेरे! जगांत हिदायतचा मार्ग अनुसरला असता, तर आज ते या परिणामापासून वाचून गेले असते!! सू.कहफ- ५२/५३ मध्ये सुध्दा हा विषय वर्णिला गेला आहे.

९) याच्यापूर्वीच्या महावाक्यांत एकेश्वरवादाशी संबंधित प्रश्न होता; हा दुसरा आवाज, पैगंबरीच्या बाबतीत आहे. म्हणजे तुमच्याकडे आम्ही पैगंबर पाठविले होते, तुम्ही यांच्याबरोबर काय मामला केला, त्यांचे आवाहन कबूल केले होते? ज्याप्रमाणे कबरीत प्रश्न विचारले जातात, तुझा पैगंबर कोण आहे? आणि तुझा धर्म कोणता आहे? ईमानवाला तर बरोबर उत्तर देऊन देतो; परंतु काफिर म्हणतो, 'हाह्हाहला अदरी' मला तर काही ठाऊक नाही. अशाच प्रकारे कयामतच्या दिवशी, त्यांना या प्रश्नाचे काही उत्तर सुचणार नाही. म्हणून पुढे सांगितले, यांच्यावर सर्व बातम्या आंधळ्या होऊन जातील; म्हणजे कोणी प्रमाण यांच्या लक्षात येणार नाही, ज्याला ते पुढे करु शकतील. तेथे प्रमाणांना बातम्या ठरवून, याकडे इशारा करुन दिला की, त्यांच्या निरर्थक धारणांसाठी, वास्तवांत, त्यांच्याजवळ कोणी प्रमाणच नाही. फक्त गोष्टी आणि हिकायती आहेत. जसे आज पण कबर पुजकांजवळ, मनघडत चमत्कारीक गोष्टी शिवाय काहीच नाही.

१०) कारण की त्यांना खात्री होऊन गेली असेल की, सर्व नरकाग्नीत दाखल होणारे आहेत.

وَرَبُّكَ يَخْلُقُ مَا يَشَآءُ وَيَخْتَارُ ۗ مَا كَانَ لَهُمُ الْخِيَرَةُ ۚ سُبْحٰنَ اللّٰهِ وَتَعٰلٰى عَمَّا يُشْرِكُوْنَ ﴿٦٨﴾

आणि तुमचा पालनकर्ता, जे इच्छितो, ते निर्माण करतो, आणि निवडून अधिकृत करुन घेतो; त्यांच्यातून कोणाला काहीही अधिकार नाही; (१) अल्लाहसाठीच पवित्रता आहे, तो थोर आहे, प्रत्येक त्या गोष्टीपासून की, (ज्यांना) लोक (अल्लाहचे) सरकतदार ठरवितात. ६८

وَرَبُّكَ يَعْلَمُ مَا تُكِنُّ صُدُوْرُهُمْ وَمَا يُعْلِنُوْنَ ﴿٦٩﴾

आणि त्यांची अंत:करणे जे काही लपवितात, आणि जे काही जाहीर करतात, तुमचा पालनकर्ता सर्व काही जाणतो. ६९

وَهُوَ اللّٰهُ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۗ لَهُ الْحَمْدُ فِى الْاُوْلٰى وَالْاٰخِرَةِ ۫ وَلَهُ الْحُكْمُ وَاِلَيْهِ تُرْجَعُوْنَ ﴿٧٠﴾

आणि तोच अल्लाह् आहे, ज्याच्याशिवाय अन्य कोणी उपासनेच्या लायक नाही. इहलोक आणि परलोकांत, त्याच्याचसाठी स्तुती आहे. त्याचीच हुकूमत आहे. आणि त्याच्याचकडे तुम्हा सर्वांस परतून जाणे होईल. ७०

قُلْ اَرَءَيْتُمْ اِنْ جَعَلَ اللّٰهُ عَلَيْكُمُ الَّيْلَ سَرْمَدًا اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ مَنْ اِلٰهٌ غَيْرُ اللّٰهِ يَاْتِيْكُمْ بِضِيَآءٍ ۗ اَفَلَا تَسْمَعُوْنَ ﴿٧١﴾

(आपण) सांगून द्या की, जरा पहा तर खरे! जर अल्लाहतआला तुमच्यावर कयामतपर्यंत रात्र रात्रच सतत करुन देईन, तर अल्लाहच्या शिवाय कोण उपास्य आहे, जो तुमच्याजवळ दिवसाचा प्रकाश आणील? काय तुम्ही ऐकत नाही? ७१

قُلْ اَرَءَيْتُمْ اِنْ جَعَلَ اللّٰهُ عَلَيْكُمُ النَّهَارَ سَرْمَدًا اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ مَنْ اِلٰهٌ غَيْرُ اللّٰهِ يَاْتِيْكُمْ بِلَيْلٍ تَسْكُنُوْنَ فِيْهِ ۗ اَفَلَا تُبْصِرُوْنَ ﴿٧٢﴾

यांना विचारा तर खरे! की हे पण सांगून द्या की, जर अल्लाहतआला तुमच्यावर नेहमीसाठी, कयामतपर्यंत, दिवसच दिवस ठेवेल, तरी सुध्दा अल्लाहतआला शिवाय कोणी उपास्य आहे, जो तुमच्याजवळ रात्र घेऊन येईल. ज्यांत तुम्ही विश्रांती घ्यावी. काय तुम्ही पाहत नाहीत. ७२

وَمِنْ رَّحْمَتِهٖ جَعَلَ لَكُمُ الَّيْلَ وَالنَّهَارَ لِتَسْكُنُوْا فِيْهِ وَلِتَبْتَغُوْا مِنْ فَضْلِهٖ وَلَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿٧٣﴾

आणि त्याने तर तुमच्या करिता, आपल्या रहमत आणि कृपेने, दिवस रात्र नक्की करुन दिले आहेत; की तुम्ही रात्रीत विश्रांती घ्यावी; आणि दिवसांत त्याने पाठविलेल्या रोजीचा शोध घ्यावा. (२) हे यासाठी की तुम्ही आभार मानावेत. (३) ७३

وَيَوْمَ يُنَادِيْهِمْ فَيَقُوْلُ اَيْنَ شُرَكَآءِىَ الَّذِيْنَ كُنْتُمْ تَزْعُمُوْنَ ﴿٧٤﴾

आणि ज्या दिवशी, त्यांना बोलावून, अल्लाहतआला विचारील , ज्यांना तुम्ही माझे पातीदार समजत होता, ते कोठे आहेत? ७४

وَنَزَعْنَا مِنْ كُلِّ اُمَّةٍ شَهِيْدًا فَقُلْنَا هَاتُوْا بُرْهَانَكُمْ فَعَلِمُوْٓا اَنَّ الْحَقَّ لِلّٰهِ وَضَلَّ عَنْهُمْ مَّا كَانُوْا يَفْتَرُوْنَ ﴿٧٥﴾

आणि आम्ही प्रत्येक उम्मत मधून, एक साक्षीदार काढून उभा करु; (४) आणि सांगून टाकू की, आपली प्रमाणे सादर करा. (५) मग त्यावेळी, त्यांना ठाऊक होऊन जाईल की, सत्य अल्लाहकडे आहे. (६) आणि जो काही खोटा आळ ते घेत होते. सर्व त्यांच्यापासून हरवून जाईल (७) ७५

إِنَّ قَارُوْنَ كَانَ مِنْ قَوْمِ مُوْسٰى فَبَغٰى عَلَيْهِمْ ۖ وَاٰتَيْنٰهُ مِنَ الْكُنُوْزِ مَآ اِنَّ مَفَاتِحَهٗ لَتَنُوْٓاُ بِالْعُصْبَةِ اُولِى الْقُوَّةِ ۚ اِذْ قَالَ لَهٗ قَوْمُهٗ لَا تَفْرَحْ اِنَّ اللّٰهَ لَا يُحِبُّ الْفَرِحِيْنَ ﴿٧٦﴾

खचितच कारुन होता तर मूसा (अ.) च्या लोकांपैकीच, परंतु त्यांच्यावर जुलूम करु लागला होता; (८) आम्ही त्याला इतके खजीने देऊन ठेवले होते की, कित्येक शक्तीमान लोक, मोठ्या मुष्कीलीने, त्याच्या किल्ल्या उचलू शकत होते; (९) एकदा त्याच्या लोकांनी त्याला सांगितले की, शेखी मिरवू नकोस! (१०) अल्लाह्तआला शेखी मिरविणाऱ्यास..पसंत करीत नाही. (११) ७६

وَابْتَغِ فِيْمَآ اٰتٰىكَ اللّٰهُ الدَّارَ الْاٰخِرَةَ وَلَا تَنْسَ نَصِيْبَكَ مِنَ الدُّنْيَا وَاَحْسِنْ كَمَآ اَحْسَنَ اللّٰهُ اِلَيْكَ وَلَا تَبْغِ الْفَسَادَ فِى الْاَرْضِ ۗ اِنَّ اللّٰهَ لَا يُحِبُّ الْمُفْسِدِيْنَ ﴿٧٧﴾

आणि जे काही अल्लाहतआलाने तुला देऊन ठेवले आहे, त्यातून शेवटच्या घराची काळजी पण करीत रहा. (१२) आणि आपल्या इहलौकीक हिश्शालाही विसरु नकोस. (१३) आणि जसा की, अल्लाह्तआलाने तुझ्यावर उपकार केला आहे, तू पण परोपकार (१४) कर; आणि मुलखांत फिसादाचा इच्छूक (१५) बनू नकोस; विश्वास बाळग की, अल्लाह्तआला, फिसाद खोरास पसंत करीत नसतो. ७७

१) म्हणजे अल्लाह्तआला तमाम गोष्टीचा अधिकारी आहे. त्याच्या मुकाबल्यांत कोणाला सुरुवातीपासून काही अधिकारच नाही. कोण आहे जो सर्व अधिकार संपन्न असावा ?

२) दिवस आणि रात्र या अल्लाहच्या फार मोठ्या देणग्या आहेत. रात्रीला अंध:कारमय बनविले की, सर्व लोकांनी

विश्रांती घेऊ शकाची. आणि अंधारामुळे सर्व सृष्टी, झोपण्याला आणि विश्रांती घेण्याला भाग पाडली जाते. नाहीतर जर, विश्रांती घेण्याचे आणि झोपण्याचे, आपले आपले वेळ असते, तर कोणी पण संपूर्णरित्या, झोपण्याची संधी न मिळविता. जेव्हा की, रोजी कमविण्याच्या दगदगीसाठी आणि, जगाच्या कारभारासाठी, झोपेचे पूर्ण करणे फारच आवश्यक आहे. याच्याशिवाय बळ प्राप्त झाले नसते. जर काही लोक झोपले असते, आणि काही जागून, धाव पळीत व्यस्त असते, तर झोपणाऱ्यांच्या झोपेत आणि विश्रांतीत व्यत्यय आला असता. तसेच लोक एक दुसऱ्याच्या मदत करण्यापासून वंचित राहिले असते. जेव्हा की, जगाची व्यवस्था, एक दुसऱ्याच्या मदत आणि सहाय्याची मोहताज आहे. याचसाठी अल्लाहने रात्रीला अंध:कारमय बनवून टाकले की, सारी सृष्टी एकाच वेळी आराम करेल, आणि कोणी, कोणाच्या झोपेत आणि विश्रांतीत, व्यत्यय आणू शकणार नाही. अशाचप्रकारे दिवसाला प्रकाशमान बनविले कारण की प्रकाशात, मनुष्य आपला कारभार उत्तमरित्या करु शकेल. दिवसाचा हा प्रकाश जर नसता, तर माणसाला ज्या अडचणींचा सामना करावा लागला असता, त्याला प्रत्येक मनुष्य सहजतेने समजतो, आणि त्याचे भान ठेवतो.

अल्लाहतआलाने आपल्या या देणग्यांच्या हवाल्याने, आपल्या एकेश्वरवादाला सिध्द केले आहे की, सांगा जर अल्लाहतआला, दिवस आणि रात्रीची ही व्यवस्था संपवून, नेहमी करिता तुमच्यावर रात्रच लादून देईल, तर अल्लाहच्या शिवाय, कोणी असा उपास्य आहे, जो तुम्हाला दिवसाचा प्रकाश देईन? किंवा तो नेहमी साठी, दिवसच दिवस ठेवेल, तर काय कोणी तुम्हास, रात्रीचा अंध:कार बहाल करु शकतो, ज्यांत तुम्ही विश्रांती घेऊ शकावी? नाही! खचित्च नाही!! ही फक्त अल्लाहची असीम कृपा आहे की, त्याने दिवस आणि रात्रीची अशी व्यवस्था कायम करुन दिली की, रात्र येते, तेव्हा दिवसाचा प्रकाश संपून जातो; आणि सर्व सृष्टी विश्रांती घेऊन घेते. आणि रात्र जाते, तेव्हा दिवसाच्या प्रकाशाने, ब्रह्मांडांतील प्रत्येक वस्तू, दृगोचर आणि एकदम स्पष्ट होऊन जाते. आणि मनुष्य आपल्या कौशल्याने आणि श्रमाने, अल्लाहचे औदार्य (रोजी) शोधत असतो.

३) म्हणजे अल्लाहची स्तुती आणि गौरव पण वर्णन करा, (हे तोंडाने आभार मानणे आहे) आणि अल्लाहने दिलेले धन, कार्यक्षमता, आणि शक्तीला, त्याचे आदेश आणि सुचनांप्रमाणे, उपयोगात आणा हे कार्मिक (म्हणजे कृतीने) आभार मानणे आहे.

४) या साक्षीदाराने अभिप्रेत पैगंबर आहे. प्रत्येक उम्मतीच्या पैगंबराला, उम्मतहून,वेगळे उभे करुन देऊ.

५) म्हणजे जगांत, माझ्या पैगंबरांच्या एकेश्वरवादाच्या आवाहनानंतर सुध्दा, तुम्ही जे माझे पातीदार ठरवीत होते; आणि माझ्या बरोबर त्यांची पण उपासना करीत होते, याचे प्रमाण सादर करा.

६) म्हणजे हैराण आणि स्तब्ध उभे राहतील. कुठलेही उत्तर आणि प्रमाण, त्यांना सुचणार नाही.

७) म्हणजे त्यांच्या कामा येणार नाही.

८) आपले लोक बनी इस्राईलवर त्याचा जुलूम हा होता की, आपल्या धन संपत्तीच्या विपुलतेमुळे, त्यांना क्षुल्लक लेखत होता. काही म्हणतात की, फिरऔनाकडून, हा आपले लोक बनीइसराईलवर, अधिकारी बनविला गेला होता; आणि त्यांच्यावर अत्याचार करीत असे,

९) 'तनुअ' चा अर्थ आहे, 'तमसील' (वांकणे) म्हणजे ज्याप्रमाणे कोणी मनुष्य जड वस्तु उचलतो, तर ओझ्यामुळे, इकडे तिकडे डळमळतो; त्याच्या किल्ल्यांचे ओझे इतके जास्त होते, की एक बलवान समूहसुध्दां, त्याला उचलतांना, त्यांना फार कठीण वाटत असे.

१०) म्हणजे धन संपत्तीवर गर्व, आणि अहंकार करु नकोस, काहीनी कंजुषीने अर्थ केला आहे; कंजुषी करु नकोस.

११) म्हणजे गर्व आणि अहंकार करणाऱ्यांना किंवा कंजुषी करणाऱ्यांना पसंत करीत नाही.

१२) म्हणजे आपल्या संपत्तीला तूंअशा जागी, आणि मार्गांत खर्च कर, जेथे अल्लाहतआला खर्च करणे पसंत करतो. यामुळे तुझा परलोक सुधारेल, आणि तेथे तुला याचा मोबदला आणि पुण्य प्रतिफळ मिळेल.

१३) आणि जगात पण योग्य ठिकाणी, संतुलनाने खर्च कर. जगातील योग्य ठिकाणे काय आहेत? खाणे पिणे, पोशाख, घर आणि लग्न वगैरे. अर्थ हा आहे की, ज्याप्रमाणे तुझ्यावर तुझ्या पालनकर्त्याचा हक्क आहे, त्याचप्रमाणे तुझ्या आपल्या जिवाचा, पत्नी मुलांचा, पाहुणे वगैरेंचा सुध्दा हक्क आहे; प्रत्येक हक्क वाल्याला त्याचा हक्क दे.

१४) अल्लाहने तुला माल देऊन तुझ्यावर उपकार केला आहे. तू लोकांवर खर्च करुन, त्यांच्यावर उपकार कर.

१५) म्हणजे, तुझा उद्देश मुलखात फिसाद फैलाविणे, नसावा. त्याचप्रमाणे अल्लाहच्या निर्मितीच्या बरोबर, चांगल्या वर्तणूकीच्या ऐवजी, वाईट वर्तणूक करु नकोस. न गुन्ह्यांचा अवलंब कर की, या सर्व गोष्टींमुळे, फिसाद फैलावतो.

قَالَ اِنَّمَآ اُوْتِيْتُهٗ عَلٰى عِلْمٍ عِنْدِيْ ؕ اَوَلَمْ يَعْلَمْ اَنَّ اللّٰهَ قَدْ اَهْلَكَ مِنْ قَبْلِهٖ مِنَ الْقُرُوْنِ مَنْ هُوَ اَشَدُّ مِنْهُ قُوَّةً وَّ اَكْثَرُ جَمْعًا ؕ وَلَا يُسْـَٔلُ عَنْ ذُنُوْبِهِمُ الْمُجْرِمُوْنَ ﴿٧٨﴾

**कारुन म्हणाला, हे सर्व काही, मला माझ्या ज्ञानाच्या जोरावरच दिले गेले आहे. (१) काय त्याला हे माहित नव्हते की, अल्लाहतआलाने, त्याच्यापूर्वी, पुष्कळशा वस्तीवाल्यांना नष्ट करुन टाकले, जे याच्यापेक्षा जास्त, बलवान आणि त्यांच्यापाशी जमापुंजी पण फार जास्त, असलेले होते; (२) आणि गुन्हेगारांना, त्यांच्या गुन्ह्यांची विचारणा, अशा वेळी केली जात नाही. (३) ७८**

فَخَرَجَ عَلٰى قَوْمِهٖ فِيْ زِيْنَتِهٖ ؕ قَالَ الَّذِيْنَ يُرِيْدُوْنَ الْحَيٰوةَ الدُّنْيَا يٰلَيْتَ لَنَا مِثْلَ مَآ اُوْتِيَ قَارُوْنُ ۙ اِنَّهٗ لَذُوْ حَظٍّ عَظِيْمٍ ﴿٧٩﴾

**तात्पर्य, कारुन पूर्ण थाटामाटाने आपल्या लोकांसमोरुन निघाला, (४) तेव्हा ऐहिक जीवनाचे अभिलाषी म्हणू लागले, (५) जे काही कारुनाला देण्यात आले आहे, तसे आम्हाला पण कोण्याप्रकारे मिळून गेले असते, हा तर फारच मोठा भाग्यवान आहे. ७९**

وَقَالَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْعِلْمَ وَيْلَكُمْ ثَوَابُ اللّٰهِ خَيْرٌ لِّمَنْ اٰمَنَ وَعَمِلَ صَالِحًا ۚ وَلَا يُلَقّٰىهَآ اِلَّا الصّٰبِرُوْنَ ﴿٨٠﴾

**आणि ज्ञानवंत लोक त्यांना समजाऊ लागले की, खेद आहे! उत्तम वस्तू तर ती आहे, जी पुण्यफल म्हणून त्यांना मिळेल, ज्यांनी अल्लाहवर ईमान आणले, आणि सुकृत्ये केलीत. (६) ही गोष्ट त्यांच्याच मनात (७) टाकण्यात येते, जे सहनशील असतात. ८०**

१) या देणग्यांच्या उत्तरांत, त्याने असे म्हटले की, मला कारागिरी आणि व्यापाराची जी कला अवगत आहे, हे धन तर त्याचाच परिणाम आणि फळ आहे. अल्लाहच्या औदार्याशी आणि कृपेशी, याचा काय संबंध आहे? दुसरा अर्थ हा केला गेला आहे की, अल्लाहने मला हे धन दिले आहे, तर त्याने आपल्या ज्ञानाने दिले आहे, की, मी याला पात्र आहे. आणि माझ्यासाठी त्याने हे पसंत केले आहे. जसा दुसऱ्या ठिकाणी, माणसांचे आणखी एक म्हणणे उद्धृत केले आहे, ''जेव्हा मनुष्याला इजा पोहचते, तेव्हा आम्हास बोलवितो; मग जेव्हा आम्ही त्याला आपल्या देणगीने उपकृत करतो, तेव्हा म्हणतो कीं, मला ही देणगी यासाठी मिळाली आहे कीं, मी अल्लाहच्या ज्ञानांत मी इला पात्र होतो.'' एका ठिकाणी आहे, ''जेव्हा आम्ही मनुष्याला संकटानंतर आपल्या रहमतखाली घेतो, तर म्हणतो, मी तर याला पात्रच होतो'' (हा-मीम-सजदा-५०) (इब्ने कसीर) काही म्हणतात कीं, कारूनाला किमीया (सोने बनविण्या)चे ज्ञान अवगत होते, येथे तेच अभिप्रेत आहे. याच सोने बनविण्याच्या विद्येने, त्याने एवढे धन मिळविले होते. परंतु इमाम इब्ने कसीर म्हणतात कीं, हे ज्ञान निव्वळ खोटे, फसविणे आणि धोका(देणे) आहे. कोणी मनुष्य या गोष्टीवर समर्थ नाही, तो कोण्या वस्तुचे स्वरूप बदलून टाकेल. म्हणून कारूनसाठी सुध्दा हे शक्य नव्हते. कीं, तो दुसऱ्या धातूंत बदल करून, सोने बनवून घेता आणि अशाप्रकारे धनाचे ढीग जमा करता.

२) म्हणजे सामर्थ्य आणि धनाची विपुलता, हे श्रेष्ठत्वाला कारणीभूत नाही. जर असे असते, तर मागील लोक नष्ट आणि बर्बाद झाले नसते. म्हणून कारूनाचे आपल्या संपत्तीवर गर्व करणे, आणि तिला आपल्या श्रेष्ठत्वासाठी कारणीभूत समजणे, याला काही अर्थ नाही.

३) म्हणजे जेव्हांअपराध इतक्या संख्येत असावे की, त्यांच्यामुळे ते शिक्षेला पात्र, ठरवून दिले गेले असावेत, तर मग त्यांच्याशी विचारणा केली जात नाही; किंबहुना अचानक त्यांची पकड केली जाते.

४) म्हणजे भूषण आणि शोभा, आणि नौकराचाकरा सह.

५) हे म्हणणारे कोण होते? काहींच्याजवळ ईमानवालेच होते; जे त्याच्या श्रीमंती आणि शान शौकतने प्रभावित होऊन गेले होते. आणि काहींच्या जवळ ते काफिर होते.

६) म्हणजे ज्यांच्याजवळ धर्माचे ज्ञान होते, आणि इहलोक आणि त्याच्या मूळ हकीकतीशी वाकीब होते; त्यांनी म्हटले कीं, हे काय आहे? काहीच नाही. अल्लाहने ईमानवाले, आणि सुकृत्ये करणाऱ्यांसाठी, जो बदला आणि पुण्यफळ, ठेवले आहे, तो याच्यापेक्षा किती तरी उत्तम आहे. जसे हदीसे कुदसी मध्ये आहे, अल्लाहतआला फर्मावितो, ''मी आपल्या नेक सेवकांसाठीं, अशा अशा वस्तू तयार करून ठेवल्या आहेत, ज्यांना कोण्या डोळ्यांनी पाहिले नाही, कोण्या कानाने ऐकले नाही; आणि न कोणाच्या कल्पनेत त्या आल्यात.'' (स.बुखारी,स.मुस्लिम)

७) म्हणजे 'युलक्काहा' मध्ये 'हा' चा मर्जा कलमा आहे; आणि हे म्हणणे अल्लाहचे आहे; आणि जर त्याला ज्ञानी लोकांच्या म्हणण्याचा, शेवटचा भाग ठरविला जाईल तर 'हा' चा मर्जा स्वर्ग होईल. म्हणजे स्वर्गाला पात्र तेच असतील, जे सहनशील असतील जे ऐहीक लज्जतीपासून दूर, आणि पारलौकीक जीवनाची आवड बाळगणारे असतील.

فَخَسَفْنَا بِهٖ وَبِدَارِهِ الْاَرْضَ ۟ فَمَا كَانَ لَهٗ مِنْ
فِئَةٍ يَّنْصُرُوْنَهٗ مِنْ دُوْنِ اللّٰهِ ۗ وَمَا كَانَ
مِنَ الْمُنْتَصِرِيْنَ ﴿٨١﴾

(शेवटी) आम्ही त्याला, त्याच्या महालासहित, जमिनीत, धसवून टाकले, [१] आणि अल्लाहच्या शिवाय,कोणीही जनसमूह त्याच्या मदतीसाठी तयार झाला नाही; न स्वत: तो आपल्याला वांचविण्याऱ्यांमधून होऊं शकला. (८१)

وَاَصْبَحَ الَّذِيْنَ تَمَنَّوْا مَكَانَهٗ بِالْاَمْسِ يَقُوْلُوْنَ
وَيْكَاَنَّ اللّٰهَ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَنْ يَّشَآءُ مِنْ
عِبَادِهٖ وَيَقْدِرُ ۚ لَوْلَآ اَنْ مَّنَّ اللّٰهُ عَلَيْنَا لَخَسَفَ
بِنَا ۭ وَيْكَاَنَّهٗ لَا يُفْلِحُ الْكٰفِرُوْنَ ﴿٨٢﴾

आणि काल जे लोक त्याच्या पदावर पोहचण्याची हाव बाळगीत होते. ते आज म्हणू लागले की, काय तुम्ही पहात [२] नाही कीं, अल्लाहतआलाच आपल्या सेवकांमधून, ज्याची इच्छितो, त्याची अन्न संपत्ती वाढवून देतो, आणि कमी पण (करतो); जर अल्लाहतआला आम्हांवर कृपा न करता, तर आम्हाला पण धसवून टाकले असते; [३] काय पहात नाही की, कृतघ्नांना, कधीही सफलता मिळत नाही. [४] (८२)

تِلْكَ الدَّارُ الْاٰخِرَةُ نَجْعَلُهَا لِلَّذِيْنَ لَا يُرِيْدُوْنَ
عُلُوًّا فِي الْاَرْضِ وَلَا فَسَادًا ۭ وَالْعَاقِبَةُ لِلْمُتَّقِيْنَ ﴿٨٣﴾

परलोकाचे हे चांगले घर, आम्ही त्यांच्याचसाठी निश्चित करून देतो, जे जगांत कोण्याही तऱ्हेची उच्चता, मोठेपण आणि गर्व करीत नाहींत न फिसाद ही इच्छितात. (अल्लाहतआलाला) भिऊन वागणाऱ्यांसाठी फारच उत्कृष्ट परिणाम आहे. [५] (८३)

مَنْ جَآءَ بِالْحَسَنَةِ فَلَهٗ خَيْرٌ مِّنْهَا ۚ وَمَنْ جَآءَ
بِالسَّيِّئَةِ فَلَا يُجْزَى الَّذِيْنَ عَمِلُوا السَّيِّاٰتِ
اِلَّا مَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿٨٤﴾

जो मनुष्य पुण्य घेऊन येईल, त्याला, त्याच्यापेक्षा उत्तम मिळेल; [६] आणि जो वाईट कर्मे घेऊन येईल, तर अशी वाईट कृत्यें करणाऱ्यांना, त्यांच्या त्याच कर्मांचा बदला, दिला जाईल, जे ते करीत होते. [७] (८४)

اِنَّ الَّذِيْ فَرَضَ عَلَيْكَ الْقُرْاٰنَ لَرَاۗدُّكَ اِلٰى
مَعَادٍ ۭ قُلْ رَّبِّيْٓ اَعْلَمُ مَنْ جَآءَ بِالْهُدٰى وَمَنْ
هُوَ فِيْ ضَلٰلٍ مُّبِيْنٍ ﴿٨٥﴾

नि:संशय ज्या अल्लाहने आपल्यावर कुरआन अवतरीत केले आहे. [८] तो तुम्हास दुसऱ्यांदा पहिल्या जागी आणणार आहे; [९] आपण सांगून द्या कीं, माझा पालनकर्ता, त्याला पण चांगल्या प्रकारे जाणतो जो सन्मार्ग घेऊन आला आहे, आणि त्याला पण जो धडधडीत चुकीत आहे. [१०] (८५)

وَمَا كُنْتَ تَرْجُوْٓا اَنْ يُّلْقٰٓى اِلَيْكَ الْكِتٰبُ اِلَّا
رَحْمَةً مِّنْ رَّبِّكَ فَلَا تَكُوْنَنَّ ظَهِيْرًا لِّلْكٰفِرِيْنَ ﴿٨٦﴾

आणि आपणास तर याची कधी कल्पना पण आली नव्हती की, आपल्याकडे पुस्तक अवतरीत केले जाईल, [११] परंतु हे आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने उतरले; [१२] तर आता तुम्हास काफिरांचे मुळीच मददगार होता, कामा नये. [१३] (८६)

وَلَا يَصُدُّنَّكَ عَنْ اٰيٰتِ اللّٰهِ بَعْدَ اِذْ اُنْزِلَتْ اِلَيْكَ
وَادْعُ اِلٰى رَبِّكَ وَلَا تَكُوْنَنَّ مِنَ الْمُشْرِكِيْنَ ﴿٨٧﴾

लक्षात ठेवा की, (ह्या काफिरांनी) तुम्हास अल्लाहच्या महावाक्यांचा प्रचार करण्यापासून रोकून न घ्यावे; [१४] याच्यानंतर की, हे (पुस्तक) आपल्याकडे उतारले गेले. तर आपल्या पालनकर्त्याकडे बोलावीत राहा. आणि शिर्क करणाऱ्यांमधून होऊ नका. (८७)

وَلَا تَدْعُ مَعَ اللّٰهِ اِلٰهًا اٰخَرَ ۘ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۣ كُلُّ
شَيْءٍ هَالِكٌ اِلَّا وَجْهَهٗ ۭ لَهُ الْحُكْمُ وَاِلَيْهِ
تُرْجَعُوْنَ ﴿٨٨﴾

आणि अल्लाहतआला बरोबर आणखी कोण्या उपास्यास बोलावू नका; [१५] अल्लाहतआलाशिवाय अन्य कोणी उपास्य नाही; प्रत्येक वस्तू नष्ट होणार आहे, परंतु त्याचेच व्यक्तीत्व (मुख) [१६] त्याचीच हुकूमत आहे, [१७] आणि तुम्ही त्याच्याचकडे परतवून नेले जाल. [१८] (८८)

१) म्हणजे कारूनाला त्याच्या गर्वामुळें, त्याचा महाल आणि खजीन्या समवेत जमिनीत धसवून देण्यात आले हदीस मध्ये आहे, रसूलुल्लाह् ﷺ नी फर्माविले, ''एक मनुष्य आपली विजार जमिनीवर लटकवीत चालला होता, अल्लाहूला त्याचा हा गर्व आवडला नाही आणि त्याला जमिनीत धसवून टाकण्यात आले. तर तो कयामत पर्यंत जमिनीत धसत चालला जाईल.'' (स.बुखारी)

२) 'मकान' ने अभिप्रेत, तो ऐहिक मर्तबा आणि उच्च पद आहे, जे जगांत कोणाला तात्पुरत्या स्वरूपात, मिळते. जसे कारूनाला मिळाले होते. अर्थ हा आहे कीं, कारूनसारखी धनसंपत्ती आणि नोकर चाकरांची हाव करणाऱ्यांनी, जेव्हा कारूनचा धडा घेण्यासारखा शेवट पाहिला, तेव्हा म्हटले कीं, धनसंपत्ती, या गोष्टीचे प्रमाण नाहीं, की, अल्लाहतआला त्या धनिकाशी, राजी आहे. काय तुम्ही पाहिले नाहीं, कीं, अल्लाहतआला कोणाला धन संपत्ती जास्त देऊन देतो; आणि कोणाला कमी. याचा संबंध त्याची मर्जी, आणि प्रगाढ ज्ञानाशी आहे. ज्याला त्याच्या शिवाय कोणी जाणत नाहीं. धनाची

विपुलता, त्याच्या प्रसन्नतेचे आणि धनाची कमी, त्याच्या नाराजीचे प्रमाण नाही. न हे श्रेष्ठत्वाचे मापकच आहे.

३) म्हणजे आम्ही सुध्दा त्या परिणामात व्यस्त झालो असतो, ज्यांत कारून व्यस्त झाला.

४) म्हणजे कारूनाने धनसंपत्ती मिळाल्यावर, आभार मानण्याच्या ऐवजी, कृतघ्नता आणि अपराधाचा मार्ग अनुसरला; तर पाहून घ्या त्याचा परिणाम काय झाला? देखो मुझे, जो दिदए इब्रत निगाह हो!

५) 'उलुव्व' चा अर्थ आहे, जुलूम आणि अत्याचार, लोकांहून आपल्याला मोठे आणि श्रेष्ठ समजणे, आणि म्हणवून घेणे, अहंकार आणि गर्व करणे, आणि श्रेष्ठ समजणे, आणि फिसादचा अर्थ आहे, नाहक लोकांचा माल गिळंकृत करणे किंवा आज्ञाभंग करीत रहाणे. की, या दोन्ही गोष्टीने, भूतलावर फिसाद फैलावतो. सांगण्यात आले कीं, अल्लाह्ला भिऊन वागणाऱ्यांचे कर्म आणि चारित्र्य, या वाईट गोष्टी आणि कोताईंने पवित्र असते. आणि अहंकाराच्या ऐवजी त्यांच्या मध्ये, शालीनता, नम्रता आणि गुन्हे करण्याच्या ऐवजी, आज्ञापालन करणे असते, आणि परलोकांतील घर म्हणजे स्वर्ग, आणि सुपरिणाम, त्यांच्याच वाट्याला येईल.

६) म्हणजे कमीत कमी , प्रत्येक पुण्याचा बदला, दहा पट तर जरूरच मिळेल. आणि ज्याच्यासाठी अल्लाह् इच्छील, याच्यापेक्षा पण जास्त, किती तरी जास्त प्रमाद करेल.

७) म्हणजे पुण्याचा बदला तर वाढवून वाढवून दिला जाईल; पण वाईटाचा बदला, वाईटा एवढाच मिळेल. म्हणजे पुण्याच्या बदल्यांत, अल्लाह्च्या कृपेने आणि वाईटाच्या बदल्यात त्याच्या न्यायाचे प्रदर्शन होईल.

८) किंवा याचे पठण, आणि त्याचा प्रचार आणि आवाहन, आपल्यावर फर्ज (कर्तव्य) केले आहे.

९) म्हणजे आपले जन्म स्थान मक्का, जेथून आपणांस निघून जाण्यास भाग पाडले गेले होते. ह. इब्ने अब्बास ؓ कडून सहीह बुखारी मध्ये याचे हेच भाष्य नोंदविण्यात आले आहे. तात्पर्य, हिजरतच्या आठ वर्षानंतर, अल्लाह्चे हे अभिवचन पूर्ण झाले; आणि आपण ﷺ नी आठ हिजरीमध्ये, विजयी म्हणून दुसऱ्यांदा मक्केत आगमन केले. काहींनी 'मआद' ने अभिप्रेत कयामत घेतली आहे. म्हणजे कयामतच्या दिवशी आपणांस ﷺ आपल्याकडे परत आणीन; आणि प्रचार आणि पैगंबरीच्या बाबतीत विचारील.

१०) हे मुशरिक लोकांच्या या उत्तरांत आहे, जे नबी ﷺ ला त्यांच्या वाडवडीलांच्या आणि रिवायती धर्माकडून, फिरून जाण्यामुळे बहकलेले समजत होते. (त्यांनी) सांगितले माझा पालनकर्ता खूप जाणतो की बहकलेला मी आहे जो अल्लाह्कडून सन्मार्ग घेऊन आलेलो आहे किंवा तुम्ही आहात, जे अल्लाह्कडून आलेल्या सन्मार्गाला कबूल करीत नाही?

११) म्हणजे पैगंबरीच्या पूर्वी आपल्या कल्पनेत आणि विचारांत पण नव्हते कीं, आपल्याला पैगंबरीसाठी निवडले जाईल. आणि आपल्यावर अल्लाह्च्या पुस्तकाचे अवतरण होईल.

१२) म्हणजे ही पैगंबरी आणि पुस्तकाचे बहाल करणे, अल्लाह्च्या खास रहमतचा परिणाम आहे, जी आपल्यावर झाली. याने हे ठाऊक झाले कीं, पैगंबरी ही कोणी कमाविलेली वस्तू नाहीं, जिला श्रमाने, प्रयत्नाने, आणि शोधून काढण्याने, प्राप्त केले जाऊ शकत असावे. किंबहुना ही एक निव्वळ, अल्लाह्कडून प्रदान केली गेलेली, वस्तू होती, अल्लाह्तआला आपल्या सेवकांमधून, ज्यांना पसंत करीत राहिला, त्यांना पैगंबरीने प्रतिष्ठा देत राहिला. येथ पावेतो कीं, ह. मुहम्मद ﷺ ला , या सुवर्ण शृंखलेची, शेवटची कडी ठरवून तिला संपवून टाकले.

१३) आता या देणगी आणि अल्लाह्च्या कृपेचे आभार, आपण अशा प्रकारे मानावे कीं, काफिरांची मदत आणि त्यांचा साथ देऊ नये.

१४) म्हणजे या काफिरांच्या गोष्टी, त्यांचे त्रास देणे, आणि त्यांच्याकडून, प्रचार आणि आवाहनच्या मार्गांत अडथळे आणणे, आपणांस कुरआनाचे पठण, आणि त्याच्या प्रचारापासून कोठे रोकून न द्यावे! किंबहुनाआपण पूर्ण शारीरिक आणि मनाच्या एकाग्रतेने, (आपल्या) पालनकर्त्याकडे बोलविण्याचे काम करीत रहावे.

१५) म्हणजे आणखी कोणाच्या उपासना करू नये व न प्रार्थनाच्या मार्फत न नवसाच्या मार्फत, न बळी देऊन; की हे सर्व उपासना आहेत. ज्या फक्त एक अल्लाह्करीता खास आहे. कुरआनामध्ये, प्रत्येक ठिकाणी, अल्लाह्शिवाय इतरांच्या उपासनेला त्यांना बोलविल्याचे ठरविले गेले आहे. ज्याचा उद्देश्य याच मुद्याचा खुलासा करणे आहे कीं, अल्लाह्शिवाय इतरांना बोलविणे, त्यांच्या जवळ मदत व दाद मागणे, त्यांच्या जवळ दुआ आणि विनंत्या करणे, हे सर्व त्यांची उपासना करणेच आहे; ज्यामुळे मनुष्य मुशरिक होऊन जातो.

१६) वजहहू (त्याचे मुख) ने अभिप्रेत अल्लाहचे व्यक्तित्व आहे. म्हणजे अल्लाहशिवाय प्रत्येक वस्तू नष्ट होणार आहे.

१७) म्हणजे त्याचाच निर्णय, जो तो इच्छील, लागू होतो. आणि त्याचाच हुकूम, ज्याचा तो इरादा करील, तोच चालतो.

१८) कारण की, तो पुण्यवानांना त्यांच्या पुण्याचा बदला आणि वाईट कृत्ये करणाऱ्यांना, त्यांच्या वाईट कृत्यांनी शिक्षा द्यावी.

महावाक्ये ६९ | (२९) सू. अन्कबूत | रुकूअ ७

(٢٩) سُوْرَةُ الْعَنْكَبُوْتِ مَكِّيَّةٌ (٨٥) آياتها ٦٩ ركوعاتها ٧

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

الٓمّٓ ۚ﴿١﴾

***अलीफ - लाम-मीम*** ①

اَحَسِبَ النَّاسُ اَنْ يُّتْرَكُوْٓا اَنْ يَّقُوْلُوْٓا اٰمَنَّا وَهُمْ لَا يُفْتَنُوْنَ ﴿٢﴾

**का लोकांनी हे समजून ठेवले आहे की, त्यांच्या फक्त हे बोलण्यावर की, आम्ही ईमान आणले आहे; आम्ही त्यांना अजमाविल्या शिवाय सोडून देऊ?** (१) ②

وَلَقَدْ فَتَنَّا الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ فَلَيَعْلَمَنَّ اللّٰهُ الَّذِيْنَ صَدَقُوْا وَلَيَعْلَمَنَّ الْكٰذِبِيْنَ ﴿٣﴾

**आणि यांच्या पूर्वीच्या लोकांना पण, आम्ही खूप अजमाविले;** (२) **खचित्च अल्लाहतआला त्यांना पण जाणून घेईल, जे खरे सांगतात; आणि त्यांना पण जाणून घेईल, जे लबाड आहेत.** ③

اَمْ حَسِبَ الَّذِيْنَ يَعْمَلُوْنَ السَّيِّاٰتِ اَنْ يَّسْبِقُوْنَا ۭ سَاۗءَ مَا يَحْكُمُوْنَ ﴿٤﴾

**का, जे लोक वाईट कृत्ये करीत आहेत, त्यांना असे वाटत आहे कीं, ते आमच्या आवाक्यांच्या बाहेर होऊन जातील''** (३) **हे लोक कशा वाईट तजवीजी करीत आहेत.** (४) ④

مَنْ كَانَ يَرْجُوْا لِقَاۗءَ اللّٰهِ فَاِنَّ اَجَلَ اللّٰهِ لَاٰتٍ ۭ وَهُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٥﴾

**ज्याला अल्लाहच्या भेटीची आशा असेल, तर अल्लाहची निश्चित केलेली वेळ खचित्च येणार आहे.** (५) **तो सर्वांचे ऐकणारा, सर्व काही जाणणारा आहे.** (६) ⑤

१) म्हणजे अशी अपेक्षा की, फक्त तोंडाने ईमान आणल्यानंतर, कुठलीही परीक्षा घेतल्याशिवाय,त्यांना सोडून देण्यात येईल, बरोबर नाही. किंबहुना त्यांना तनमन आणि धनाची संकटे आणि दुसऱ्या कसोट्या मार्फत, तावून, सुलाखून घेतले जाईल की, खऱ्या खोट्यांना, प्रामाणिक आणि लबाडांना, आणि विश्वासू आणि दांभिकांना, ओळखून घेतले जावे.

२) म्हणजे ही अल्लाहची पध्दत (सुन्नत) आहे, जी पुर्वापार चालत आली आहे. म्हणून तो या उम्मतीच्या विश्वासूची सुध्दा, परीक्षा घेईल, ज्या प्रमाणे, पहिल्या उम्मतीची कसोटी घेण्यांत आली. या महावाक्याच्या अवतरणाच्या कारणांच्या रिवायतीमध्ये येते, कीं, सहाबा कराम ﵃ नी त्या जुलूम आणि अत्याचारांची तक्रार केली, जो मक्केच्या काफिरांकडून त्यांच्यावर केला जात असे आणि रसूलुल्लाहु ﷺ ला दुआ करण्याची विनंती केली कीं, अल्लाहतआलाने त्यांची मदत करावी. आपण ﷺ नी फर्माविले कीं, हा जांच आणि इजा पोहचविणे, ईमानवाल्यांच्या इतिहासाचा, एक भाग आहे. तुमच्या पूर्वी काही ईमानवाल्यांची ही गत केली गेली कीं, त्यांना एक खड्डा खोदून त्यांत त्यांना उभे करून देण्यात आले, आणि नंतर त्यांच्या डोक्यांवर करवत चालविली गेली. ज्यामुळे त्यांची शरीरे दोन भागात विभागली गेली. अशाच प्रकारे लोखंडाचे कंगवे त्यांच्या मांसावर हाडांपर्यंत फिरविण्यात आलेत. परंतु या इजा त्यांना, सत्य धर्मापासून फिरविण्यात, यशस्वी झाल्या नाहीत. (स. बुखारी) ह. अम्मार ﵁ यांची आई ह. सुमैय्या, आणि वडील ह. यासिर, ह सुहैब, ह बिलाल ﵁ व मिकदाद वगैरे रिजवानुल्लाह अलैहिम व अजमईन वर, इस्लामच्या सुरुवातीच्या काळात, जे जुलुम आणि अत्याचारांचे डोंगर कोसळले, ते इतिहासाच्या पृष्ठांत सुरक्षित आहेत. या घटनाच या महावाक्यांच्या अवतरणाला कारणीभूत झाल्यात. तथापि सर्व साधारण शब्दांच्या अनुषंगाने, कयामत पर्यंतचे ईमानवाले यांच्यात दाखल आहेत.

३) म्हणजे आमच्यापासून पळून जातील, आणि आमच्या पकडीत येऊ शकणार नाहीत.

४) म्हणजे अल्लाहच्या बाबतीत, कोण्या बद्गुमानीत ते व्यस्त आहेत, जेव्हा की तो सर्व समर्थ आहे; आणि प्रत्येक गोष्टीचा जाणणारा पण. मग त्याचे आज्ञाभंजन करुन, त्याच्या पकड आणि शिक्षेपासून वांचणे, कसे काय शक्य आहे?

५) म्हणजे ज्याला परलोकाचा विश्वास आहे, आणि तो मोबदला आणि पुण्यप्रतिफळाच्या आशेवर, सुकृत्ये करीत आहे. अल्लाहतआला त्याच्या आशा पूर्ण करील आणि त्याला त्याच्या कर्मांचा पूर्ण मोबदला प्रदान करील. कारण की, कयामत खचित्च घडून येणारच आहे आणि अल्लाहचे न्यायालय अवश्य कायम होणार आहे.

६) तो सेवकांच्या गोष्टी आणि दुआ, ऐकणारा आणि त्यांच्या गुप्त आणि उघड सर्व कर्मांना जाणणारा आहे. त्यांच्या प्रमाणे तो बक्षिस आणि शिक्षा खचित्च देईल.

وَمَنْ جَاهَدَ فَإِنَّمَا يُجَاهِدُ لِنَفْسِهٖ ۭ اِنَّ اللّٰهَ لَغَنِيٌّ عَنِ الْعٰلَمِيْنَ ۝

आणि प्रत्येक प्रयत्न करणारा, आपल्याच भल्यासाठी प्रयत्न करतो; तसा तर अल्लाहतआला, सकल जगाच्या लोकांकडून निरपेक्ष आहे.[१] ६

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَنُكَفِّرَنَّ عَنْهُمْ سَيِّاٰتِهِمْ وَلَنَجْزِيَنَّهُمْ اَحْسَنَ الَّذِيْ كَانُوْا يَعْمَلُوْنَ ۝

आणि ज्या लोकांनी विश्वास धरला, आणि सुन्नतप्रमाणे कर्मे केलीत, आम्ही त्यांच्या सर्व अपराधांना, त्यांच्यापासून दूर करून टाकू; आणि त्यांना त्यांच्या चांगल्या कामांचे उत्कृष्ट बदले देऊ.[२] ७

وَوَصَّيْنَا الْاِنْسَانَ بِوَالِدَيْهِ حُسْنًا ۭ وَاِنْ جَاهَدٰكَ لِتُشْرِكَ بِيْ مَا لَيْسَ لَكَ بِهٖ عِلْمٌ فَلَا تُطِعْهُمَا ۭ اِلَيَّ مَرْجِعُكُمْ فَاُنَبِّئُكُمْ بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ۝

आणि आम्ही प्रत्येक माणसाला, आपल्या आईबापा बरोबर, चांगले वर्तन करण्याचा उपदेश केला आहे;[३] होय! परंतु ते जर हा प्रयत्न करतील कीं, तुम्ही माझ्याबरोबर त्याला पातीदार बनवून घ्यावे, ज्याचे तुम्हांस काही ज्ञान नाही; तर त्यांचे म्हणणे मानू नये;[४] तुम्हा सर्वांस माझ्याच कडे परतून येणे आहे; मग मी प्रत्येक गोष्टीची, ज्या तुम्ही करीत होता, तुम्हास त्या विदीत करेल, ८

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَنُدْخِلَنَّهُمْ فِي الصّٰلِحِيْنَ ۝

आणि ज्या लोकांनी ईमान कबूल केले, आणि चांगली कामे केलीत, त्यांना मी आपल्या सदाचरणी सेवकांत दाखल करून घेईन.[५] ९

१) याचा अर्थ तोच आहे, ''जो सुकृत्ये करील, त्याचा फायदा त्यालाच होईल.'' (सू.जासीया- १५) नाहीतर अल्लाहत्आला तर सेवकांच्या कर्मांकडून निरपेक्ष आहे. जर सर्वच्या सर्व सदाचरणी होऊन जातील, तर त्यामुळे त्याच्या बादशाहीत, सामर्थ्य आणि वाढ होणार नाही. आणि सर्व आज्ञाभंजक होऊन जातील, तर याच्याने त्याच्या बादशाहीमध्ये, काही कमी होणार नाही. शब्दांच्या अनुषंगाने, यांच्यात काफिरांबरोबर जिहाद, पण शामील आहे. कारण ते पण तसे पाहता सुकृत्यच आहे.

२) म्हणजे असे असून सुध्दा की, अल्लाहतआला तमाम सृष्टीकडून निरपेक्ष आहे, तो निव्वळ आपल्या मेहरबानी आणि कृपेने, ईमानवाल्यांना, त्यांच्या कर्मांचा उत्तम मोबदला प्रदान करील. आणि एकेका पुण्यावर किती तरी पट, मोबदला आणि पुण्य प्रतिफल, देईल.

३) कुरआन करीमच्या वेगवेगळ्या ठिकाणी, अल्लाहतआलाने, एकेश्वरवाद आणि उपासनेच्या हुकूमाबरोबर, आई वडिलांशी चांगल्या वर्तणूकीची ताकीद केली आहे; ज्यामुळे या हुकुमाचा खुलासा होतो की, रुबुबियते कुबरा (एक उपास्य)च्या तगाद्यांना तोच चांगल्या प्रकारे समजू शकतो, आणि त्यांना अदा करु शकतो जो रुबुबियते सुगरा (आईबाप) च्या आज्ञापालन आणि सेवेच्या तगाद्यांना समजतो आणि अदा करतो. जो मनुष्य ही गोष्ट समजण्यास असमर्थ आहे की, जगामध्ये त्याचे अस्तित्व, आईबापांच्या आपसांत जवळीक साधण्याचा परिणाम आहे. आणि त्याला शिकवणे आणि त्याचे पालन पोषण, त्यांची असीम कृपा आणि वात्सल्याचे फळ आहे. म्हणूनच मला त्यांच्या सेवेत कोणी कुचराई, आणि त्यांच्या आज्ञापालनांत टाळाटाळ न केली पाहिजे. तो खचित्‌च सृष्टीकर्त्याला समजण्यास, आणि त्याच्या एकेश्वरवाद आणि उपासनेच्या तगाद्यांना अदा करण्याला पण असमर्थ राहील. याचसाठी हदीशींमध्ये सुध्दा, आई बापांबरोबर चांगल्या वागणूकीची ताकीद आली आहे. एका हदीसमध्ये, आईबापांच्या सुप्रसन्नतेला, अल्लाहची प्रसन्नता आणि त्यांच्या नाराजगीला, अल्लाहच्या नाराजीचे कारण ठरविण्यात आले आहे.

४) म्हणजे आईबाप जर शिर्कचा हुकूम देतील, (आणि याच्यातच दुसऱ्या गुन्ह्यांचा पण समावेश आहे) आणि याच्यासाठी खास प्रयत्नपण करतील, (जसे की, मुजाहिदाच्या शब्दाने स्पष्ट आहे) तर त्यांचे आज्ञापालन करु नये. कारण की, 'अल्लाहच्या आज्ञाभंजनांत, कोणाचे आज्ञापालन नाही.'' (मुसनद अहमद) या महावाक्याच्या अवतरणाच्या कारणांमध्ये, ह. सआद बिन अबी वक्कास رضي الله عنه ची गोष्ट येते की, त्यांच्या मुसलमान होण्यावर, त्यांच्या आईने सांगितले, मी काही खाणार नाही, आणि काही पिणार नाही, येथपावेतो की मला मृत्यु येऊन जाईल, किंवा मग तू मुहम्मद (ﷺ) च्या पैगंबरीला नाकारुन टाकशील. सरशेवटी ते आपल्या आईला जबरदस्तीने तोंड उघडून खाऊ घालत, ज्यावर हे महावाक्य प्रकट झाले. (स. मुस्लिम, तिर्मिझी)

५) म्हणजे जर कोणाचे आईबाप मुशरिक असतील, तर ईमानवाला मुलगा सदाचरणी लोकांबरोबर असेल; आई बापांबरोबर नाहीं. यासाठी जरी आईबाप या जगात त्यांच्या फार जवळ राहिले असतील; परंतु त्याचे धार्मिक प्रेम, ईमानवाल्यांबरोबरच होते. ''मनुष्य त्या लोकांबरोबर राहील, ज्यांच्याशी तो प्रेम करतो.'' च्या अंतर्गत तो सदाचरणी लोकांच्या जथ्यांत राहील.

وَمِنَ النَّاسِ مَنْ يَّقُوْلُ اٰمَنَّا بِاللّٰهِ فَاِذَاۤ اُوْذِيَ فِي اللّٰهِ
جَعَلَ فِتْنَةَ النَّاسِ كَعَذَابِ اللّٰهِ ؕ وَلَىِٕنْ جَآءَ
نَصْرٌ مِّنْ رَّبِّكَ لَيَقُوْلُنَّ اِنَّا كُنَّا مَعَكُمْ ؕ اَوَلَيْسَ
اللّٰهُ بِاَعْلَمَ بِمَا فِيْ صُدُوْرِ الْعٰلَمِيْنَ ⑩

**आणि काही लोक असे पण आहेत, जे तोंडी (तर) म्हणतात की, आम्ही ईमान आणले आहे; पण जेव्हा अल्लाहच्या मार्गात कोणी संकट येऊन कोसळते, तर लोकांच्या इजा पोहचविण्याला, अल्लाहतआलाच्या शिक्षेसारखे बनवून घेतात; (१) होय, पण जर अल्लाहची मदत येऊन पोहचेल, (२) तर बोलून पडतात, कीं, आम्ही तर तुमच्याच बरोबर आहोत; (३) की जगातील (लोकांच्या) मनात जे काही आहे, त्याला अल्लाहतआला जाणीत नाही? (४) (१०)**

وَلَيَعْلَمَنَّ اللّٰهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَلَيَعْلَمَنَّ الْمُنٰفِقِيْنَ ⑪

**आणि ज्या लोकांनी ईमान आणले, अल्लाह त्यांना पण जाणून घेईल; आणि दांभिकांना पण ओळखूनच घेईल. (५) (११)**

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لِلَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّبِعُوْا سَبِيْلَنَا
وَلْنَحْمِلْ خَطٰيٰكُمْ ؕ وَمَا هُمْ بِحٰمِلِيْنَ مِنْ خَطٰيٰهُمْ مِّنْ
شَيْءٍ ؕ اِنَّهُمْ لَكٰذِبُوْنَ ⑫

**आणि काफिरांनी ईमानवाल्यांना म्हटले की, तुम्ही तर आमच्या मार्गाचे अनुकरण करा; तुमची पापे आम्ही उचलून घेऊ. (६) वास्तविक ते यांच्या पापांतून काहीही उचलणार नाहीत; हे तर निव्वळ लबाड आहेत. (७) (१२)**

१) यांच्यात दांभिक लोकांची, किंवा दुर्बल ईमानवाल्यांची,स्थिती वर्णन केली गेली आहे, की ईमानाच्या कारणाने त्यांना इजा पोहचते तर अल्लाहच्या शिक्षेप्रमाणे ती त्यांना सहन होत नाही, परिणामत: ते ईमान कडून फिरून जातात. आणि जनतेच्या धर्माला अंगीकारून घेतात.

२) म्हणजे मुसलमानांना विजय आणि वर्चस्व प्राप्त होऊन जावे.

३) म्हणजे तुमचे धार्मिक बंधू आहेत. हा तोच विषय आहे, जो दुसऱ्या ठिकाणी अशाप्रकारे वर्णन करण्यात आला आहे. ''ते लोक तुम्हास पहात असतात, जर तुम्हास अल्लाहकडून विजय प्राप्त होतो, तर म्हणतात काय आम्ही तुमच्याबरोबर नव्हतो? आणि जर परिस्थिती काफिरांसाठी अनुकुल असते, तर (काफिरांजवळ जाऊन) म्हणतात, काय आम्ही तुम्हांस घेरून घेतले नव्हते, आणि मुसलमानांपासून तुम्हास वाचविले नव्हते?'' (सू.निसाअ-१४१)

४) म्हणजे, काय अल्लाह त्या गोष्टींना जाणत नाही, ज्या तुमच्या मनांत आहे आणि तुमच्या अंत:करणांत गुप्त आहेत; जरी तुम्ही तोंडाने मुसलमानांचे साथी होणे जाहीर करतात.

५) याचा अर्थ आहे कीं, अल्लाहतआला आनंद आणि दु:ख देऊन अजमावितो. की, ईमानवाल्यांची आणि दांभिकाची ओळख होऊन जावी. जो (दोन्ही स्थितीत) अल्लाहचे आज्ञापालन करेल, तो ईमानवाला आहे; आणि जो फक्त आनंदात आणि आरामांत आज्ञापालन करेल, तर याचा अर्थ हा आहे कीं, तो फक्त आपल्या मनोकामनेचा ताबेदार आहे, अल्लाहचा नाहीं. जसे कीं, दुसऱ्या ठिकाणी फर्माविलें, ''आम्ही जरूर तुम्हास आजमाऊ कारण आम्ही जाणून घ्यावे की तुमच्यांत जिहाद करणारा आणि सहनशील कोण आहे? आणि तुमच्या (दुसऱ्या स्थिती) पण पडताळून पाहू'' (सू. मुहम्मद-३१) उहदच्या युध्दांनंतर, ज्यांत मुसलमान कसोटी आणि परीक्षेच्या कसोटीच्या भट्टीतून पार पाडले गेले होते; फर्माविले, ''अल्लाहतआला असा नाही कीं, त्याने सोडून द्यावे ईमानवाल्यांना या स्थितीत, की ज्यात तुम्ही आहात, येथ पावेतो की त्याने वेगळे करून द्यावे, अपवित्रांना, पवित्रांपासून'' (सू.आले इमरान- १७९)

६) म्हणजे तुम्ही याच वाडवडीलांच्या धर्माकडे परतून या, ज्यावर आम्ही आतांपर्यंत कायम आहोत; यासाठी कीं तोच धर्म बरोबर आहे, जर या रिवायती धर्मावर तुम्ही अंमलबजावणी केल्याने गुन्हेगार होणार असाल तर त्याला जबाबदार आम्ही आहोत. ते ओझे आम्ही आपल्या शिरावर घेऊ.

७) अल्लाहतआलाने फर्माविले, हे लबाड आहेत. कयामतचा दिवस तर असा असेल की, तेथे कोणी कोणाचे ओझे उचलणार नाहीं. तेथे तर एक मित्र दुसऱ्या मित्राला विचारणार नाहीं. जरी त्यांच्यांत घनदाट मैत्री असेल. ''येथपावेतो नातेवाईक एक दुसाऱ्याचे ओझे उचलणार नाहींत.''(सू.मआरिज-१०) ''कोणीपण ओझे उचलणारा, दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही, जर कोणी ओझेवाला, दुसऱ्याला आपले ओझे उचलण्यास बोलावील तर तो त्यातून काहीही उचलणार नाही; जरी तो नातेवाईकच असला.'' (सू.फातिर-१८)

وَلَيَحْمِلُنَّ أَثْقَالَهُمْ وَأَثْقَالًا مَّعَ أَثْقَالِهِمْ ۖ وَلَيُسْأَلُنَّ
يَوْمَ الْقِيَامَةِ عَمَّا كَانُوا يَفْتَرُونَ ﴿١٣﴾

आणि तथापि, ते आपली ओझी वाहून घेतील; आणि आपल्य ओझ्याबरोबर, आणखी ओझी सुध्दा. [१] अणि जे काही कुभांड ते रचीत आहेत, या सर्वांच्या बाबतीत, त्यांच्याशी विचारपुस केली जाईल. (१३)

وَلَقَدْ أَرْسَلْنَا نُوحًا إِلَىٰ قَوْمِهِ فَلَبِثَ فِيهِمْ أَلْفَ سَنَةٍ
إِلَّا خَمْسِينَ عَامًا فَأَخَذَهُمُ الطُّوفَانُ وَهُمْ ظَالِمُونَ ﴿١٤﴾

आणि आम्ही ‘नूह’ ला त्याच्या लोकांकडे पाठविले; ते त्यांच्यात साडे नऊशे वर्षे पर्यंत राहिले; [२] मग तर त्यांना वादळाने येऊन गाठले; आणि ते होते ही जुलमी (१४)

فَأَنجَيْنَاهُ وَأَصْحَابَ السَّفِينَةِ وَجَعَلْنَاهَا آيَةً لِّلْعَالَمِينَ ﴿١٥﴾

मग आम्ही त्यांची आणि नाववाल्यांची सुटका करुन दिली. आणि घटनेला आम्ही आलम दुनियेसाठी, धडा घेण्याचे चिन्ह करून टाकले (१५)

وَإِبْرَاهِيمَ إِذْ قَالَ لِقَوْمِهِ اعْبُدُوا اللَّهَ وَاتَّقُوهُ ۖ ذَٰلِكُمْ
خَيْرٌ لَّكُمْ إِن كُنتُمْ تَعْلَمُونَ ﴿١٦﴾

आणि इब्राहीमने पण आपल्या लोकांना सांगितले कीं, तुम्ही अल्लाह्‌ची उपासना करा, आणि त्याला भित रहा; जर तुमच्यांत शहाणपण असेल, तर हेच तुमच्यासाठी उत्तम आहे. (१६)

إِنَّمَا تَعْبُدُونَ مِن دُونِ اللَّهِ أَوْثَانًا وَتَخْلُقُونَ إِفْكًا ۚ
إِنَّ الَّذِينَ تَعْبُدُونَ مِن دُونِ اللَّهِ لَا يَمْلِكُونَ
لَكُمْ رِزْقًا فَابْتَغُوا عِندَ اللَّهِ الرِّزْقَ وَاعْبُدُوهُ
وَاشْكُرُوا لَهُ ۖ إِلَيْهِ تُرْجَعُونَ ﴿١٧﴾

तुम्ही तर अल्लाहतआला शिवायमूर्त्यांची पूजा करीत आहात आणि खोट्या गोष्टी मनाने घडवितात; [३] ऐका! ज्यांची ज्यांची तुम्ही, अल्लाह्‌तआलाच्या शिवाय पुजा अर्चा करीत आहांत ते तर तुमच्या अन्नसंपत्तीचे मालक नाहीत. बस! तुम्हास पाहिजे की, अल्लाह्‌तआला जवळच अन्नसंपत्ती मागा; आणि त्याचीच उपासना करा. आणि त्याचेच आभार माना; [४] आणि त्याच्याचकडे तुम्ही परतून जाणार आहांत[५] (१७)

وَإِن تُكَذِّبُوا فَقَدْ كَذَّبَ أُمَمٌ مِّن قَبْلِكُمْ ۖ وَمَا عَلَى
الرَّسُولِ إِلَّا الْبَلَاغُ الْمُبِينُ ﴿١٨﴾

आणि जर तुम्ही खोटे ठरवाल तर तुमच्या पूर्वीच्या लोकसमूहांनी सुध्दा खोटे ठरवले आहे. [६] पैगंबर तर फक्त स्पष्टपणे पोहचवून देण्याचीच जबाबदारी आहे. [७] (१८)

أَوَلَمْ يَرَوْا كَيْفَ يُبْدِئُ اللَّهُ الْخَلْقَ ثُمَّ يُعِيدُهُ ۚ
إِنَّ ذَٰلِكَ عَلَى اللَّهِ يَسِيرٌ ﴿١٩﴾

काय त्यांनी पाहिले नाहीं, की सृष्टीची सुरवात, अल्लाह्‌ने कशाप्रकारे केली. मग अल्लाह्‌ याची पुनरावृत्ती करीन; [८] हे तर अल्लाह्‌साठी फारच सोपे आहे. [९] (१९)

قُلْ سِيرُوا فِي الْأَرْضِ فَانظُرُوا كَيْفَ بَدَأَ الْخَلْقَ ۚ
ثُمَّ اللَّهُ يُنشِئُ النَّشْأَةَ الْآخِرَةَ ۚ إِنَّ اللَّهَ عَلَىٰ كُلِّ
شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٢٠﴾

(आपण) सांगून द्या की, भूतलावर चालून फिरून पहा तर खरे की, [१०] कशाप्रकारे अल्लाह्‌तआलाने सुरवातीला निर्मिती केली; मग अल्लाह्‌तआलाच दुसरी नवी निर्मिती करेल. अल्लाह्‌ सर्व सामर्थवान आहे. (२०)

يُعَذِّبُ مَن يَشَاءُ وَيَرْحَمُ مَن يَشَاءُ ۖ وَإِلَيْهِ
تُقْلَبُونَ ﴿٢١﴾

ज्याला इच्छील, त्याला शिक्षा देईल; आणि ज्यावर इच्छील त्यावर दया करेल; सर्व त्याच्याच कडे परतविले जाणार आहेत. [११] (२१)

१) म्हणजे हे काफिरांचे पुढारी आणि अडाणी पणाचे इच्छुक आपलेच ओझे उचलणार नाहीं; किंबहुना त्या लोकांच्या पापांचे ओझे पण त्यांच्यावर असेल, जे यांच्या प्रयत्नाने बहकले होते. हा विषय सू. नहल-२५ मध्ये सुध्दा येऊन चुकला आहे. हदीसमध्ये आहे, जो हिदायतकडे बोलवितो, त्याच्याकरिता त्याच्या पुण्याच्या मोबदल्या बरोबर, त्या लोकांच्या पुण्याचा पण मोबदला असेल, जे त्याच्यामुळे कयामत पर्यंत हिदायतचे अनुकरण करतील; याशिवाय कीं त्यांच्या मोबदल्यात काही कमी व्हावी. आणि जो मार्ग भ्रष्टतेचा आवाहक असेल त्याच्या करिता त्याच्या आपल्या पापांशिवाय त्या लोकांच्या पापांचे ओझेपण असेल जे कयामतपर्यंत, त्याच्यामुळे मार्गभ्रष्टतेचे अनुकरण करणारे होतील. याशिवाय कीं, त्यांच्या पापात काही कमी व्हावे.''(अबुदाऊद, इब्ने माजा) याच तत्वाने कयामत पर्यंत, अन्यायाने ठार झालेल्यांच्या खुनाचे पाप, आदम عليه السلام चा पहिला मुलगा (काबील) वर राहील.यासाठी कीं, सर्वांत

पहिले, त्यानेच नाहक खून केला होता. (मसनद अहमद-३८३/१)
२) कुरआनाच्या शब्दांनी ठाऊक होते कीं, हे त्यांच्या आवाहन आणि प्रचाराचे वय आहे. त्यांचे पूर्ण वय किती होते? त्याचा खुलासा केला गेला नाहीं. काही म्हणतात कीं, चाळीस वर्षे पैगंबरीच्या पहिले, आणि साठ वर्षे वादळानंतर, याच्यांत शामील करून घेतले जावे. आणखीही बरीच मते आहेत. वल्लाहू अअलम बिस्सवाब!
३) 'अवसान' 'वसन'चे अनेक वचन आहे. ज्याप्रमाणे 'असनाम' सनमचे अनेक वचन आहे. दोघांचा अर्थ मुर्त्यांचा आहे. काही म्हणतात की, 'सनम' सोने, चांदी, पितळ आणि दगडाच्या मुर्तीला आणि 'वसन' मुर्तीलापण, आणि निवडलेल्या दगड वगैरे पासून बनविलेल्या स्थानांना पण, म्हणतात. दुसरा अर्थ आहे, खोट्या उद्देशाने त्यांना बनवितात आणि घडतात. विषयाच्या अनुषंगाने दोन्ही अर्थ बरोबर आहेत. म्हणजे अल्लाहूला सोडून तुम्ही ज्या मूर्तींची उपासना करतात, ते तर दगडाचे बनविलेले आहेत. जे ऐकू शकत नाही आणि पाहू शकत नाहीत, नुकसान पोहचवू शकत नाही, न नफा. आपल्या मनानेच तुम्ही त्यांना घडले आहे. कोणी प्रमाण तर, त्यांच्या सत्यतेसाठी तुमच्याजवळ नाही. किंवा या मुर्त्या तर त्या आहे, ज्यांना तुम्ही स्वत: आपल्या हाताने कोरतात आणि घडवितात. मग जेव्हा याचे खास स्वरुप बनून जाते, तेव्हा तुम्ही समजतात की यांच्यात, अल्लाहूचे अधिकार येऊन गेले. आणि त्यांच्याशी तुम्ही आशा बांधून, त्यांना इच्छापूर्ती करणारे, आणि संकट विमोचक, ठरवून घेतात.
४) म्हणजे जेव्हा या मुर्त्या, तुमच्या अन्नसंपत्तीच्या साधन सामुग्री मध्ये कुठल्याही वस्तुचे मालक नाही. न पाऊस पाडू शकतात, न जमिनीत वृक्ष उगवू शकतात आणि न सूर्याची उष्णता पोहचवू शकतात. न तुम्हास त्या क्षमता देऊ शकतात ज्यांना कामास लावून तुम्ही निसर्गाच्या त्या वस्तूंपासून लाभ मिळवित असतात. तर मग तुम्ही अन्नसंपत्ती अल्लाहकडेच मागा. त्याची उपासना आणि त्याचेच आभार माना.
५) म्हणजे मरुन, आणि पुन्हा दुसऱ्यांदा जीवंत होऊन, जेव्हा त्याच्याचकडे परतून जाणे आहे; त्याच्याच समक्ष हजर होणे आहे, तर मग त्याची चौकट सोडून, दुसऱ्यांच्या चौकटीवर आपले कपाळ का टेकवितात? त्याच्याशिवाय दुसऱ्याची उपासना का करतात? आणि दुसऱ्यांना इच्छापूर्ती करणारे, आणि संकट विमोचक का समजतात?
६) हे ह. इब्राहीम عليه السلام चे म्हणणे सुध्दा असू शकते, जे त्यांनी आपल्या लोकांना सांगितले. किंवा अल्लाहचे म्हणणे आहे. ज्यांत मक्कावाल्यांना संबोधित करण्यात आले आहे. आणि यांच्यात नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे सांत्वन करण्यात येत आहे. की, जर मक्केचे काफिर तुम्हास खोटे ठरवत आहेत, तर याने घाबरण्याचे कारण नाही. पैगंबरांबरोबर असेच होत आले आहे. पहिले लोक समूह सुध्दां, पैगंबरांना खोठे ठरवीत, आणि याचा परिणाम पण ते नष्ट होण्याच्या आणि बर्बादी स्वरुपात, ते भोगत राहिले आहेत.
७) म्हणून आपण सुध्दा धर्म प्रचाराचे काम करीत रहा. यापासून कोणी मार्गाला लागतो किंवा लागत नाही? याला तुम्ही जबाबदार नाही. न आपल्याला याच्या बाबतीत विचारले जाईल; कारण की, हिदायत देणे अथवा न देणे, हे फक्त अल्लाहूच्या अधिकारांत आहे. जो आपल्या पध्दतीनुसार, ज्यांच्यात हिदायत मिळविण्याची इच्छा पाहतो, त्याला हिदायत देऊन टाकतो. दुसऱ्यांना अज्ञानाच्या अंध:कारांत भटकत असतांना सोडून देतो.
८) एकेश्वरवाद आणि पैगंबरीच्या प्रमाणानंतर, येथून मआद (परलोका) चे प्रमाण दिले जात आहे, ज्याला काफिर नाकारत होते. सांगितले, पहिल्या वेळेस, निर्माण करणारा सुध्दा, तोच आहे, जेव्हा तुमचे सुरुवातीपासून काही अस्तित्वच नव्हते; मग तुम्ही पहाणारे, ऐकणारे, आणि समजणारे, बनून गेलेत. मग जेव्हा तुम्ही मरुन मातीत मिसळून जाल, उघडरित्या तुमचे नांव निशाणपण राहणार नाही. अल्लाहूतआला, तुम्हास दुसऱ्यांदा जिवंत करीन.
९) म्हणजे ही गोष्ट तुम्हास किती का कठीण वाटेना! अल्लाहूसाठी फारच सोपी आहे.
१०) म्हणजे आकाश आणि पृथ्वीत अल्लाहच्या पसरलेल्या निशाण्या पहा. जमिनीवर विचार करा, कशा प्रकारे तिला आंथरले; तिच्यात पर्वत, दऱ्या, नद्या आणि समुद्र बनविले. इच्यातूनच निरनिराळ्या प्रकारची अन्न संपत्ती, आणि फळे निर्माण केलीत. काय हे सर्व, या गोष्टीला प्रमाण नाही की, त्यांना बनविण्यात आले आहे; आणि त्यांचा कोणी बनविणारा आहे?
११) म्हणजे तोच खरा सत्ताधीश, आणि न्याय निवाडा, करणारा आहे. त्याला कोणी विचारु शकत नाही. तथापि त्याची शिक्षा किंवा दया, अशीच अधांतरी होणार नाही; किंबहुना त्या तत्त्वांप्रमाणे होईल, जे त्याने त्याच्यासाठी निश्चित करुन ठेवले आहेत.

وَمَآ اَنۡتُمۡ بِمُعۡجِزِيۡنَ فِى الۡاَرۡضِ وَلَا فِى السَّمَآءِ‌ۖ
وَمَا لَـكُمۡ مِّنۡ دُوۡنِ اللّٰهِ مِنۡ وَّلِىٍّ وَّلَا نَصِيۡرٍ ﴿۲۲﴾

**आणि तुम्ही न तर जमिनीत अल्लाहतआलाला हरवूशकता, न आकाशात न अल्लाहतआला शिवाय तुमचा कोणी वाली आहे, न मददगार. (२२)**

وَالَّذِيۡنَ كَفَرُوۡا بِاٰيٰتِ اللّٰهِ وَلِقَآئِهٖۤ اُولٰٓـئِكَ يَئِسُوۡا
مِنۡ رَّحۡمَتِىۡ وَاُولٰٓـئِكَ لَهُمۡ عَذَابٌ اَلِيۡمٌ ﴿۲۳﴾

**आणि जे लोक अल्लाहतआलाच्या निशाण्यात, आणि त्याच्या भेटीला विसरुन जातात, त्यांनी माझ्या रहमतकडून निराश होऊन जावे. [१] आणि त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा आहे. (२३)**

فَمَا كَانَ جَوَابَ قَوۡمِهٖۤ اِلَّاۤ اَنۡ قَالُوا اقۡتُلُوۡهُ اَوۡ
حَرِّقُوۡهُ فَاَنۡجٰٮهُ اللّٰهُ مِنَ النَّارِ‌ؕ اِنَّ فِىۡ ذٰ لِكَ لَاٰيٰتٍ
لِّقَوۡمٍ يُّؤۡمِنُوۡنَ ﴿۲۴﴾

**त्यांच्या लोकांचे उत्तर, याच्याशिवाय काही नव्हते की, याला मारुन टाका; किंवा त्याला जाळून टाका. [२] शेवटी अल्लाहने त्यांना आगीपासून वाचवून घेतले. [३] याच्यात ईमानवाल्यांसाठी तर फारच निशाण्या आहेत. (२४)**

وَقَالَ اِنَّمَا اتَّخَذۡتُمۡ مِّنۡ دُوۡنِ اللّٰهِ اَوۡثَانًا ۙ
مَّوَدَّةَ بَيۡنِكُمۡ فِى الۡحَيٰوةِ الدُّنۡيَا‌ ۚ ثُمَّ يَوۡمَ الۡقِيٰمَةِ
يَكۡفُرُ بَعۡضُكُمۡ بِبَعۡضٍ وَّيَلۡعَنُ بَعۡضُكُمۡ بَعۡضًا
وَّمَاۡوٰٮكُمُ النَّارُ وَمَا لَـكُمۡ مِّنۡ نّٰصِرِيۡنَ ﴿۲۵﴾

**आणि (ह. इब्राहीम अ.ने) म्हटले, की तुम्ही ज्या मूर्तींची उपासना, अल्लाहतआलाच्या शिवाय केली आहे, हे काही नाही फक्त त्यांना तुम्ही आपल्या आपसांतील ऐहिक मैत्रीच्या आधारावर, ठरवून घेतले आहे; [४] मग कालांतराने तुम्ही सर्व कयामतच्या दिवशी एक दुसऱ्याला नाकारु लागाल, आणि एक दुसऱ्याला शाप देऊ लागाल, [५] आणि तुम्हा सर्वांचे ठिकाण नरकाग्नी होईल, आणि तुमचा कोणी मददगार असणार नाही. (२५)**

१) अल्लाहतआलाची रहमत जगांत सर्वांसाठी आहे. ज्याच्याने काफिर आणि विश्वासू, दांभिक आणि खरे, पुण्यवान आणि पापी, एकसारखे लाभान्वयीत होत आहेत. अल्लाहूतआला सर्वांना ऐहिक साधन सामुग्री, सुखसोयी , आणि धनसंपत्ती प्रदान करीत आहे. ही अल्लाहच्या रहमतची ती विशालता (सर्वांना सामाऊन घेणारी) आहे, जिला अल्लाहतआलाने दुसऱ्या ठिकाणी असे सांगितले, ''माझ्या रहमतने प्रत्येक वस्तुला घेरून ठेवले आहे.'' (सू.आअराफ-१५६) परंतु परलोक जे कीं, बदला देण्याचे ठिकाण आहे, मनुष्याने जगाच्या शेतीत जे काही पेरले असेल, त्याचेच पीक, त्याला तेथे कापावे लागेल. जशी कर्मे केली असतील, त्याचेच प्रतिफळ त्याला तेथे मिळेल. अल्लाहच्या दरबारांत निर्भिड फैसले होतील. या जगासारखीच जर परलोकांत पण, सदाचरणी आणि दुराचरणी यांच्या बरोबर एकच वागणूक झाली; आणि विश्वासू आणि काफिर दोहोसुध्दां, अल्लाहच्या रहमतला पात्र ठरविले गेले, तर याच्याने एक तर, अल्लाहतआलाच्या न्यायाच्या वैशिष्ट्यावर ठपका येतो. दुसरे असे कीं, कयामतचा उद्देश्यच नष्ट होऊन जातो. कयामतचा दिवस तर अल्लाहने ठेवलाच यासाठी आहे कीं, तेथे सदाचरणी लोकांना, त्यांच्या पुण्याच्या बदल्यात स्वर्ग, आणि दुराचरणी लोकांना, त्यांच्या पापांच्या बदल्यांत नर्क दिला जावा. म्हणून कयामतच्या दिवशी, अल्लाहतआलाची रहमत फक्त ईमानवाल्यांसाठी खास असेल, ज्याला येथे पण सांगण्यांत आले आहे, कीं जे लोक परलोकालाच नाकारणारे असतील ते माझ्या रहमतकडून निराश होतील. म्हणजे, त्यांच्या वाट्याला अल्लाहची रहमत येणार नाही. सू. आअ्राफमध्ये याला या शब्दांत वर्णन केले गेले आहे, ''मी ही रहमत (परलोकांत) त्या लोकांसाठी लिहीन, जे सदाचरणी, जकात अदा करणारे, आणि आमच्या निशाण्यांवर ईमान ठेवणारे असतील.''(सू.आअ्राफ - १५६)

२) या महावाक्यांच्या पूर्वी,ह. इब्राहीम عليه السلام ची गोष्ट सांगण्यांत येत होती. आता, पुन्हा मग त्याची बाकी (गोष्ट) सांगण्यात येत आहे. दर्म्यान मध्ये, विषयांतर म्हणून अल्लाहचा एकेश्वरवाद, त्याचे सामर्थ्य आणि शक्तीचे वर्णन करण्यांत आले आहे. काही म्हणतात कीं हे सर्व ह. इब्राहीम عليه السلام च्याच भाषणाचा एक भाग आहे. ज्यांत, त्यांनी एकेश्वरवाद आणि परलोक, सिध्द करण्यासाठी प्रमाणे दिली आहेत. ज्याचे काही उत्तर, त्यांच्या लोकांकडून देता आले नाही म्हणून त्याचे उत्तर, जुलूम आणि अत्याचाऱ्याच्या या कार्यवाहीने दिले, ज्याचा उल्लेख या महावाक्यांत आहे कीं, त्याला ठार मारून टाका किंवा जाळून टाका. म्हणून त्यांनी आगीचा एक फार मोठा ढीग तयार करून, ह. इब्राहीस عليه السلام ला गोफणीच्या सहाय्याने त्यात फेकून दिले.

३) म्हणजे अल्लाहने त्या आगीला, बगीच्याच्या रूपांत बदलून, आपला सेवक, इब्राहीम عليه السلام ला वाचवून घेतले. जसे कीं, सू. अंबियामध्ये, येऊन चुकले.

४) म्हणजे या तुमच्या राष्ट्रीय मूर्त्या आहेत; ज्या तुमचे एकत्र येणे, आणि आपसांतील मैत्रीचा आधार आहेत. जर तुम्ही यांची उपासना सोडून द्याल, तुमचे राष्ट्रीयत्व आणि मैत्रीचा आधार नामशेष होईल.

५) म्हणजे कयामतच्या दिवशी, तुम्ही एक दुसऱ्याला नाकाराल आणि मैत्रीच्या ऐवजी एक दुसऱ्याला शाप देणार, आणि अधीन, ज्यांचे ते अधीन आहे, त्यांची निर्भत्सना आणि गुरू शिष्यांपासून अलिप्त असल्याचे जाहीर करतील.

فَاٰمَنَ لَهٗ لُوْطٌ ۘ وَقَالَ اِنِّیْ مُهَاجِرٌ اِلٰی رَبِّیْ ؕ اِنَّهٗ هُوَ الْعَزِیْزُ الْحَكِیْمُ ﴿٢٦﴾

मग ह. इब्राहीम (अ.) वर ह.लूत (अ.) ने ईमान आणले; (१) आणि म्हणू लागले, मी आपल्या पालनकर्त्यांकडे स्वदेश त्याग करुन जाणार आहे. (२) तो मोठाच सामर्थ्यवान आणि बुध्दीमान आहे. (२६)

وَوَهَبْنَا لَهٗۤ اِسْحٰقَ وَیَعْقُوْبَ وَجَعَلْنَا فِیْ ذُرِّیَّتِهِ النُّبُوَّةَ وَالْكِتٰبَ وَاٰتَیْنٰهُ اَجْرَهٗ فِی الدُّنْیَا ۚ وَاِنَّهٗ فِی الْاٰخِرَةِ لَمِنَ الصّٰلِحِیْنَ ﴿٢٧﴾

आणि आम्ही इब्राहीम (अ.) ला, इस्हाक व याकूब प्रदान केलेत, आणि आम्ही पैगंबरी आणि पुस्तक, त्यांच्या संतती मध्येच करुन दिले, (३) आणि आम्ही जगातसुध्दा त्याला प्रतिफळ दिले, (४) आणि परलोकांत तर तो सदाचरणी लोकांमधून आहे. (५) (२७)

وَلُوْطًا اِذْ قَالَ لِقَوْمِهٖۤ اِنَّكُمْ لَتَاْتُوْنَ الْفَاحِشَةَ ۫ مَا سَبَقَكُمْ بِهَا مِنْ اَحَدٍ مِّنَ الْعٰلَمِیْنَ ﴿٢٨﴾

आणि ह. लूतचा पण उल्लेख करा, जेव्हा की, त्यांनी आपल्या लोकांना सांगितले की, तुम्ही तर असे कुकृत्य करीतात, (६) ज्याला तुमच्या पूर्वी आलम दुनियेत, कोणीही केले नाही. (२८)

اَئِنَّكُمْ لَتَاْتُوْنَ الرِّجَالَ وَتَقْطَعُوْنَ السَّبِیْلَ ۙ۬ وَتَاْتُوْنَ فِیْ نَادِیْكُمُ الْمُنْكَرَ ؕ فَمَا كَانَ جَوَابَ قَوْمِهٖۤ اِلَّاۤ اَنْ قَالُوا ائْتِنَا بِعَذَابِ اللّٰهِ اِنْ كُنْتَ مِنَ الصّٰدِقِیْنَ ﴿٢٩﴾

का तुम्ही पुरुषांजवळ जातात, (७) आणि रस्ते अडवितात. (८) आणि आपल्या सर्वसाधारण सभेत, निर्लज्जपणाची कामे करतात? (९) याच्या उत्तरांत त्याच्या लोकांनी, या शिवाय काही म्हटले नाही, की जा! (१०) जर तू खरा आहेस, तर आमच्याजवळ अल्लाहची शिक्षा घेऊन ये. (२९)

قَالَ رَبِّ انْصُرْنِیْ عَلَی الْقَوْمِ الْمُفْسِدِیْنَ ﴿٣٠﴾ ع

ह.लूत(अ.) ने प्रार्थना केली (११) हे माझ्या पालनकर्त्या! त्या फिसादी लोकांवर माझी मदत कर. (३०)

وَلَمَّا جَآءَتْ رُسُلُنَاۤ اِبْرٰهِیْمَ بِالْبُشْرٰی ۙ قَالُوْۤا اِنَّا مُهْلِكُوْۤا اَهْلِ هٰذِهِ الْقَرْیَةِ ۚ اِنَّ اَهْلَهَا كَانُوْا ظٰلِمِیْنَ ﴿٣١﴾

आणि जेव्हा आमचे पाठविलेले देवदूत, ह. इब्राहीम (अ.) जवळ शुभ सूचना घेऊन पोहोचले, तेव्हा म्हणू लागले की, या वस्तीवाल्यांना आम्ही नष्ट करणार आहोत (१२) खचित्च येथील राहणारे गुन्हेगार आहेत (३१)

قَالَ اِنَّ فِیْهَا لُوْطًا ؕ قَالُوْا نَحْنُ اَعْلَمُ بِمَنْ فِیْهَا ۫ لَنُنَجِّیَنَّهٗ وَاَهْلَهٗۤ اِلَّا امْرَاَتَهٗ ۫ كَانَتْ مِنَ الْغٰبِرِیْنَ ﴿٣٢﴾

(ह. इब्राहीम अ.ने) म्हटले, याच्यांत तर लूत (अ.) आहेत, देवदूत म्हणाले, येथे जे आहेत, त्यांना आम्ही चांगल्या प्रकारे ओळखतो; (१३) लूतला आणि त्याच्या कुटुंबाला, त्याच्या पत्नीशिवाय, आम्ही वाचवून घेऊ; तथापि ती स्त्री, मागे राहून जाणाऱ्यांमधून आहे. (१४) (३२)

وَلَمَّاۤ اَنْ جَآءَتْ رُسُلُنَا لُوْطًا سِیْٓءَ بِهِمْ وَضَاقَ بِهِمْ ذَرْعًا وَّقَالُوْا لَا تَخَفْ وَلَا تَحْزَنْ ۫ اِنَّا مُنَجُّوْكَ وَاَهْلَكَ اِلَّا امْرَاَتَكَ كَانَتْ مِنَ الْغٰبِرِیْنَ ﴿٣٣﴾

आणि मग जेव्हा आमचे देवदूत लूत (अ.) जवळ पोहोचले तर त्यांच्यामुळे दु:खी झाले आणि मनातल्या मनात दु:ख करु लागले. (१५) दुतांनी सांगितले आपण भिऊ नका. आणि खेदही करु नका. आम्ही आपणांस व आपल्या कुटुंबियास वाचवून घेऊ; परंतु आपली पत्नी (१६) की, जी शिक्षेसाठी बाकी राहणाऱ्यांमधून होईन. (३३)

اِنَّا مُنْزِلُوْنَ عَلٰۤی اَهْلِ هٰذِهِ الْقَرْیَةِ رِجْزًا مِّنَ السَّمَآءِ بِمَا كَانُوْا یَفْسُقُوْنَ ﴿٣٤﴾

आम्ही या वस्तीवाल्यांवर, आकाशी शिक्षा अवतरीत करणार आहोत. (१७) यासाठी की ते आज्ञाभंजक होत आहेत. (३४)

१) ह. लूत عليه السلام ह. इब्राहीम عليه السلام चे पुतणे होते. यांनी ह. इब्राहीम عليه السلام वर ईमान आणले; नंतर त्यांना पण 'सदूम' च्या इलाख्याकडे पैगंबर बनवून पाठविण्यांत आले.

२) हे ह. इब्राहीम عليه السلام नी म्हटले काहींच्या जवळ ह. लूत عليه السلام नी, आणि काही म्हणतात, दोघांनी पण स्वदेश त्याग केला म्हणजे जेव्हा ह. इब्राहीम عليه السلام आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्या, ह. लूत عليه السلام साठी आपला इलाखा 'कोसी' मध्ये, जो हरानकडे जात असतांना कोपऱ्यातील एक वस्ती होती, अल्लाह्ची उपासना करणे मुश्कील होऊन गेले, तेव्हा तेथून हिजरत करून, सीरियाच्या इलाख्यात चालले गेले; तिसरी, त्यांच्याबरोबर ह. इब्राहीम عليه السلام ची पत्नी सारा होती.

३) म्हणजे ह. इस्हाक عليه السلام पासून ह. याकूब عليه السلام झाले. ज्यांच्यापासून बनी इस्राईलचा वंश चालला. आणि त्यांच्यातच सर्व पैगंबर झालेत. आणि पुस्तके, आलीत. शेवटी, नबी करीम ﷺ, ह. इब्राहिम عليه السلام चे दुसरे पुत्र, ह. इस्माईल عليه السلام च्या वंशातून, पैगंबर झाले. आणि आपल्यावर कुरआन अवतरीत झाले.

४) या प्रतिफळाने अभिप्रेत, ऐहिक रोजी पण आहे, आणि चांगला उल्लेख पण (आहे) म्हणजे जगामध्ये प्रत्येक धर्माचे लोक, (ख्रिस्ती, यहूदी वगैरे येथ पावेतो कीं, मुशरिक सुध्दा) ह. इब्राहीम عليه السلام चा मान सन्मान आणि आदर करतात.

आणि मुसलमान तर आहेतच, इब्राहीमी समाजाचे अनुयायी; त्यांचे जवळ ते आदर सन्माननीय का होणार नाही?
५) म्हणजे परलोकांत पण ते उच्च दर्जा प्राप्त करणारे, आणि सदाचरणी लोकांच्या समूहामधून होतील. याच विषयाला दुसऱ्या ठिकाणी अशा प्रकारे सांगितले, ''व आतय नाहु फिद्दुनिया हसनतन् व इन्नहु फिल आखिरती लमिनस् सालेहीन.'' (सू.नहल- १२२)
६) या कुकृत्याने अभिप्रेत, तोच समलिंगी संभोग आहे, ज्याची सुरुवात, लूतच्या लोकांनी सर्व प्रथम केली. जसे की, कुरआनाने स्पष्ट केले आहे.
७) म्हणजे तुमची कामवासना या टोकापर्यंत पोहचून गेली आहे की, याच्याकरिता स्वाभाविक पध्दती, तुमच्याकरिता अपूर्ण पडत आहे. आणि अस्वाभाविक पध्दत तुम्ही अंगिकारली आहे. लैंगिक वासनेच्या समाधानासाठी, स्वाभाविक पध्दत अल्लाहूतआलाने, पत्नींशी संभोगाच्या, स्वरुपात ठेवली आहे. त्याला सोडून, या कामासाठी पुरुषांचा पार्श्वभाग, उपयोगात आणणे, अनैसर्गिक आणि अस्वाभाविक पध्दत आहे.
८) याचा एक अर्थ तर हा केला गेला आहे की, येणारे जाणारे प्रवासी, नवीन लोक, आणि रस्त्याने जाणाऱ्यांना जबरदस्तीने पकडून पकडून तुम्ही, त्यांच्याशी निर्लज्जपणाचे काम करीत असतात. त्यामुळे लोकांसाठी, रस्त्याने जाणे कठीण होऊन गेले, आणि लोक घरात बसून राहण्यातच क्षेमकुशल समजतात, दुसरा अर्थ आहे की, तुम्ही येणाऱ्या जाणाऱ्यांना, लुटून घेतात आणि ठार करुन टाकतात. किंवा खोडकरपणा म्हणून त्यांना खडे मारतात. तिसरा अर्थ केला गेला आहे की, भररस्त्यातच निर्लज्जपणाचे काम करतात. ज्यामुळे तेथून जाणाऱ्या लोकांना लाज वाटते. या सर्व प्रकारांनी रस्ते बंद होऊन जातात. इमाम शौकानी म्हणतात की, कोण्या एका खास सबबीला निश्चित करणे तर कठीण आहे; तथापि ते असे काही काम जरुर करीत होते, ज्यामुळे रस्ता वाहतूक बंद होऊन जात होती. 'कतअतरीक' चा एक अर्थ, 'कतअनस्ल' (वंशबंदी) पण केला गेला आहे. म्हणजे स्त्रियांच्या गुप्तेंद्रियाचा उपयोग करण्याच्या ऐवजी, पुरुषांचा पार्श्वभाग उपयोगात आणून, तुम्ही आपला वंशपण बंद करण्याच्या मागे लागला आहात. (फत्हुल कदीर)
९) हा निर्लज्जपणा काय होता? यांत सुध्दा वेगवेगळे कथन आहेत. उदाहरणार्थ, लोकांना खडे मारणे, अनोळखी प्रवाशांची थट्टा मस्करी, बैठकींमध्ये हवा सोडणे, एक दुसऱ्याच्यासमोर, मुलांबरोबर बदकर्म करणे, बुध्दीबळ वगैरे सारखी जुगार खेळणे, रंगवलेले कपडे घालणे, वगैरे इमाम शौकानी म्हणतात, की शक्यता आहे की, ते सर्व या मना केलेल्या गोष्टी करत असावेत.
१०) ह.लूत عليه السلام नी जेव्हा या अशोभनीय गोष्टीपासून, त्यांना मना केले, तर याच्या उत्तरांत म्हटले......
११) म्हणजे जेव्हा लूत عليه السلام लोकांच्या सुधारण्यापासून निराश होऊन गेलेत, तेव्हा अल्लाहडे मदतीची दुआ केली.
१२) म्हणजे ह.लूत अ.ची दुआ मान्य करण्यात आली. आणि अल्लाहतआलाने देवदुतांना, नष्ट करण्यासाठी पाठवून दिले. ते देवदूत प्रथम ह. इब्राहीम عليه السلام जवळ गेलेत. आणि त्यांना इस्हाक आणि याकूबची खुषखबरी दिली. आणि त्याबरोबरच सांगून टाकले की, आम्ही लूतच्या वस्तीला नष्ट करण्यासाठी आलो आहोत.
१३) म्हणजे आम्हाला याचे ज्ञान आहे की, सदाचरणी आणि ईमानवाले कोण आहेत? आणि खोडकर कोण?
१४) म्हणजे त्या मागे राहून जाणाऱ्यांमध्ये, ज्यांना शिक्षेमार्फत नष्ट केले जाणार आहे, कारण की, ती ईमानवाली नव्हती, किंबहुना आपल्या लोकांची तरफदारी करीत होती, म्हणून तिला पण नष्ट करुन टाकण्यात आले.
१५) 'सी अबिहिम' चा अर्थ आहे, त्यांच्याजवळ अशी गोष्ट, आली जी त्यांना वाईट वाटली. आणि तिला भिऊन गेले. यासाठी लूत عليه السلام त्या देवदुतांना, जे मानवी रुपांत आले होते, मानवच समजले. आपल्या लोकांच्या वाईट सवयी आणि शिरजोरीने भ्याले. त्यांच्या सुंदर पाहुण्यांच्या आगमनाचे जर त्यांना ठाऊक झाले, तर ते त्यांच्याशी बळजबरीने निर्लज्जपणाने काम करतील; ज्यामुळे माझी फजिती, होईल. म्हणजे त्यांच्या सुस्वरुप पाहुण्यांना, वाईट गुणांनी युक्त, लोकांपासून वाचविण्यासाठी, काही युक्ती त्यांना सुचली नाही. ज्यामुळे ते दु:खी आणि मनांतल्या मनांत परेशान होते.
१६) देवदुतांनी ह. लूत عليه السلام च्या या परेशानी आणि दु:खाच्या परिस्थितीचे अवलोकन केले, तर त्यांचे सांत्वन समाधान केले आणि सांगितले की तुम्ही काही भीती आणि दु:ख, बाळगू नका; आम्ही अल्लाहकडून पाठविलेले देवदूत आहोत. आमच्या उद्देश आपल्याला, आणि आपल्या घरवाल्यांना, आपल्या पत्नी शिवाय, सुटका करुन देणे आहे.
१७) या आकाशी शिक्षेने तीच शिक्षा अभिप्रेत आहे, जिच्याने लूतच्या लोकांना नष्ट करुन टाकले गेले. असे म्हणतात की, जिब्रईलने, त्यांच्या वस्तीला जमिनीतून उपटले, आकाशाच्या उंचीपर्यंत घेऊन गेले, मग त्यांना त्यांच्यावरच उलटवून देण्यात आले. याच्यानंतर खंगर दगडांची वर्षा त्यांच्यावर झाली. आणि या वस्तीला अत्यंत घाणेरड्या दुर्गंधाच्या तळ्यांत बदलून दिले गेले. (इब्ने कसीर).

وَلَقَدْ تَّرَكْنَا مِنْهَآ اٰيَةًۢ بَيِّنَةً لِّقَوْمٍ يَّعْقِلُوْنَ ۝٣٥

**आणि अलबत् आम्ही या वस्तीला, एक स्पष्ट धडा (घेण्याची) निशाणी बनवून टाकले;[१] त्या लोकांसाठी जे बुध्दी बाळगतात.[२] ३५**

وَاِلٰى مَدْيَنَ اَخَاهُمْ شُعَيْبًا ۙ فَقَالَ يٰقَوْمِ اعْبُدُوا اللّٰهَ وَارْجُوا الْيَوْمَ الْاٰخِرَ وَلَا تَعْثَوْا فِى الْاَرْضِ مُفْسِدِيْنَ ۝٣٦

**आणि मदयनकडे[३] आम्ही त्यांचे भाऊ शोएब (अ.) ला पाठविले; त्यांनी सांगितले हे माझ्या लोकांनो! अल्लाह्ची उपासना करा, आणि कयामतच्या दिवसाची आशा बाळगा[४] आणि मुलखांत फिसाद फैलावित फिरु नका.[५] ३६**

فَكَذَّبُوْهُ فَاَخَذَتْهُمُ الرَّجْفَةُ فَاَصْبَحُوْا فِىْ دَارِهِمْ جٰثِمِيْنَ ۝٣٧

**तरी सुध्दां, त्यांनी त्यांना खोटे ठरवले, शेवटी त्यांना भूकंपाने येऊन गाठळे, आणि ते आपल्या घरांत, बसल्या बसल्याच मृत होऊन गेले[६] ३७**

وَعَادًا وَّثَمُوْدَا۟ وَقَدْ تَّبَيَّنَ لَكُمْ مِّنْ مَّسٰكِنِهِمْ ۫ وَزَيَّنَ لَهُمُ الشَّيْطٰنُ اَعْمَالَهُمْ فَصَدَّهُمْ عَنِ السَّبِيْلِ وَكَانُوْا مُسْتَبْصِرِيْنَ ۝٣٨

**आणि आम्ही 'आद' आणि 'समूद' यांना पण नष्ट केले, ज्यांची काही घरे, तुम्हाला स्पष्ट दिसून येतात.[७] आणि शैतानाने त्यांना, त्यांची कुकर्मे, सुशोभित करुन दाखवली होती; आणि त्यांना सरळ मार्ग पत्करण्यापासून अडवून टाकले होते. यावर सुध्दा की, ते डोळस आणि शहाणे लोक होते.[८] ३८**

१) म्हणजे दगडांचे ते खंगर, ज्यांची वर्षा त्यांच्यावर झाली, काळे दुर्गंध युक्त पाणी, आणि उलटविलेल्या वस्त्या, या सर्व धडा घेण्यासारख्या निशाण्या आहेत; परंतु कोणासाठी? बुध्दीमानांसाठी.

२) यासाठी की, तेच प्रकरणात चिंतन, मनन करतात; साधन सामुग्री आणि कर्म करणाऱ्यांची छाननी करतां, आणि परिणामांचे अवलोकन करतात. परंतु जे लोक बुध्दी आणि समजने वंचित असतात; त्यांच्या या गोष्टींशी काय संबंध? ते तर त्या पशुंसारखे आहेत, ज्यांना जबाह करण्यासाठी कत्तलखान्यांत घेऊन जाण्यात येते, परंतु त्यांना याची जाणीवच नसते. यांच्यात मक्केच्या मुशरिक लोकांसाठी सुध्दा चेतावणी आहे की, ते पण, खोटे ठरविण्याचा आणि टाळण्याचा, मार्ग अनुसरुन, याच मूर्खपणा आणि बेपवाईचे प्रदर्शन करीत आहेत. जो बुध्दी आणि शहाणपणापासून, वंचित लोकांचा रवैय्या आहे.

३) 'मदयन' ह. इब्राहीम عليه السلام च्या मुलाचे नाव होते. काहींच्याजवळ हे त्यांच्या नातवाचे नांव आहे. मुलाचे नांव मदियान होते. यांच्याच नांवावर त्या घराण्याचे नांव पडून गेले. जो यांच्या वंशावर सामील होता. याच मदयन घराण्याकडे, ह. शोएब عليه السلام ला पैगंबर बनवून पाठविण्यात आले. काही म्हणतात की, 'मदयन' शहराचे नांव होते. हे घराणे किंवा शहर, लूत عليه السلام च्या वस्तीच्या जवळच होते.

४) अल्लाह्च्या उपासनेनंतर, त्यांना परलोकाची आठवण करुन देण्यात आली. यासाठी की ते एकतर परलोकाला नाकारणारे होते. किंवा यासाठी की ते त्याला विसरुन गेले होते. आणि गुन्ह्यांमध्ये व्यस्त होते. आणि जे लोक परलोकाला विसरुन जातील, ते गुन्हे करण्यात धाडसी होऊन जातात. जशी आज मुसलमानांच्या बहुतेकांची स्थिती आहे.

५) मापा तोलांत कमी, आणि लोकांना कमी देणे. हा रोग त्यांच्यात सर्रास होता. आणि गुन्हे करण्यात पण त्यांना काही संकोच वाटत नसे. ज्यामुळे मुलुख फिसादाने भरुन गेला होता.

६) शोएब عليه السلام च्या हितोपदेशाचा त्यांच्यावर काही परिणाम झाला नाही. सरशेवटी, ढगांच्या सावलीच्या दिवशी, जिब्रईल عليه السلام च्या एका कडक आरोळीने जमीन भूकंपाने, कांपून उठली; ज्यामुळे त्यांची हृदये, त्यांच्या डोळ्यांत येऊन लागली, आणि त्यांचा मृत्यू घडून आला; आणि ते गुडघ्यावर बसलेलेचे बसलेलेच राहून गेलेत.

७) आदच्या लोकांची वस्ती, अहकाफ, हजरमुत, (यमन) च्या जवळ, आणि समूदची वस्ती हिज्र, जिला आजकाल मदायन सॉलेह म्हणतात, हिजाजच्या उत्तरेला आहे. या इलाख्यांतून, अरबांचे व्यापारी काफले, येत जात होते. यासाठी या वस्त्या यांच्यासाठी अनोळखी नव्हत्या, किंबहुना परिचित होत्या.

८) म्हणजे ते होते बुध्दीमान आणि हुशार, परंतु धर्माच्या मामल्यांत, त्यांनी आपल्या बुध्दीने, आणि दुरदृष्टीने, काही काम घेतले नाही. म्हणून ही अक्कल आणि समज त्यांच्या काही कामा आली नाही.

وَقَارُوْنَ وَفِرْعَوْنَ وَهَامٰنَ قف وَلَقَدْ جَآءَهُمْ مُّوْسٰى بِالْبَيِّنٰتِ فَاسْتَكْبَرُوْا فِى الْاَرْضِ وَمَا كَانُوْا سٰبِقِيْنَ ﴿٣٩﴾

आणि कारुन, व फिरऔन, व हामान, यांना सुध्दा, त्यांच्याजवळ ह. मुसा (अ.) खुले खुले चमत्कार घेऊन आले होते;[१] तरी सुध्दा त्यांनी मुलुखात गर्व केला; परंतु आमच्यापुढे जाणारे होऊ शकले नाही.[२] ﴿३९﴾

فَكُلًّا اَخَذْنَا بِذَنْبِهٖ ج فَمِنْهُمْ مَّنْ اَرْسَلْنَا عَلَيْهِ حَاصِبًا ج وَمِنْهُمْ مَّنْ اَخَذَتْهُ الصَّيْحَةُ ج وَمِنْهُمْ مَّنْ خَسَفْنَا بِهِ الْاَرْضَ ج وَمِنْهُمْ مَّنْ اَغْرَقْنَا ج وَمَا كَانَ اللّٰهُ لِيَظْلِمَهُمْ وَلٰكِنْ كَانُوْٓا اَنْفُسَهُمْ يَظْلِمُوْنَ ﴿٤٠﴾

मग तर प्रत्येकाला आम्ही त्याच्या अपराधाच्या ओझ्याने पकडून घेतले.[३] त्यांच्यातून काहींवर आम्ही दगडांचा वर्षाव केला;[४] आणि त्यांच्यातून काहींना, जोरदार कडक गर्जनेने, दाबून टाकले;[५] आणि त्यांच्यातून काहींना आम्ही जमिनीत धंसवून टाकले;[६] आणि त्यांच्यातून काहींना, आम्ही बुडवून टाकले.[७] अल्लाहतआला असा नव्हता की, त्यांच्यावर जुलुम करेल, किंबहुना हेच लोक आपल्या जीवावर जुलुम करीत होते.[८] ﴿४०﴾

مَثَلُ الَّذِيْنَ اتَّخَذُوْا مِنْ دُوْنِ اللّٰهِ اَوْلِيَآءَ كَمَثَلِ الْعَنْكَبُوْتِ ۚ اِتَّخَذَتْ بَيْتًا ط وَاِنَّ اَوْهَنَ الْبُيُوْتِ لَبَيْتُ الْعَنْكَبُوْتِ م لَوْ كَانُوْا يَعْلَمُوْنَ ﴿٤١﴾

ज्या लोकांनी अल्लाहतआलाच्या शिवाय, आणखी कार्यसाधक बनवून ठेवले आहेत, त्यांची उपमा कोळ्यासारखी आहे. की तो एक घर बनवून घेतो, वास्तविक तमाम घरांपेक्षा जास्त कमजोर घर, कोळ्याचेच आहे;[९] जर हे जाणून घेतले असते. ﴿४१﴾

اِنَّ اللّٰهَ يَعْلَمُ مَا يَدْعُوْنَ مِنْ دُوْنِهٖ مِنْ شَيْءٍ ط وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٤٢﴾

नि:संशय अल्लाहतआला त्या सर्व वस्तुंना जाणतो, ज्यांना ते, त्याच्या शिवाय बोलवितात. तो सामर्थ्यवान आणि बुध्दीमान आहे. ﴿४२﴾

وَتِلْكَ الْاَمْثَالُ نَضْرِبُهَا لِلنَّاسِ ج وَمَا يَعْقِلُهَآ اِلَّا الْعٰلِمُوْنَ ﴿٤٣﴾

आम्ही या उदाहरणांना, लोकांकरिता वर्णन करीत आहोत.[१०] यांना फक्त ज्ञानी लोकच जाणतात.[११] ﴿४३﴾

خَلَقَ اللّٰهُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ بِالْحَقِّ ط اِنَّ فِىْ ذٰلِكَ لَاٰيَةً لِّلْمُؤْمِنِيْنَ ﴿٤٤﴾ ع

अल्लाहतआलाने आकाश आणि पृथ्वीला संकल्प आणि सत्त्यासह निर्माण केले आहे.[१२] ईमानवाल्यांसाठी तर, यांच्यात मोठी भारी निशाणी आहे.[१३] ﴿४४﴾

१) म्हणजे प्रमाणे आणि चमत्कार यांचा काही परिणाम त्यांच्यावर झाला नाही; आणि नेहमीप्रमाणे अहंकारी बनून राहिले. म्हणजे ईमान आणि ईशभय अंगीकारण्यापासून पळ काढला.

२) म्हणजे आमच्या पकडीपासून वाचून जाऊ शकले नाही. आणि आमच्या शिक्षेच्या पकडीत येऊन गेले. एक दुसरे भाषांतर आहे की, 'हे कुफ्रमध्ये पुढे जाणारे नव्हते.' किंबहुना यांच्या पूर्वीसुध्दा, पुष्कळशे लोकसमूह होऊन गेलेत, त्यांनी अशाच प्रकारे कुफ्र आणि अहंकाराचा मार्ग अनुसरुन ठेवला होता.

३) म्हणजे या चर्चित लोकांतून, प्रत्येकाची त्यांच्या अपराधांच्या बदल्यांत, आम्ही पकड केली.

४) हे 'आद' चे लोक होते. ज्यांच्यावर फारच सोसाट्याने वाहणाऱ्या वाऱ्याची शिक्षा आली. हा वारा जमिनीवरुन खडे उडवून, उडवून, त्यांच्यावर वर्षावीत होता. सरशेवटी, यांची तीव्रता एवढी वाढली की, त्यांना उचलून आकाशापर्यंत घेऊन जाई, त्यांना डोक्याकडून जमिनीवर पटकून देई. ज्यामुळे त्याचे शिर वेगळे, आणि धड वेगळे होऊन जाई. जणू की, ते खजुरीचे पोकळ खोडे आहेत. (इब्ने कसीर)

५) हे ह. सॉलेह عليه السلام चे लोक, समूद आहेत. ज्यांना त्यांच्या म्हणण्याने, एका दगडाच्या शिळेतून, उंटीण काढून दाखवण्यात आली. परंतु या जालिमांनी ईमान आणण्याऐवजी, त्या उंटीणीलाच ठार मारुन टाकले. ज्यानंतर तीन दिवसांनी, त्यांच्यावर तीव्र गर्जनेची शिक्षा आली. जिने त्यांच्या आवाजाला आणि हालचालीला शांत करुन टाकले.

६) हा कारुन आहे, ज्याला धनसंपत्तीचे खजिने देण्यात आले होते. परंतु तो या घमेंडीत राहिला की ही धनसंपत्ती या गोष्टीचे प्रमाण आहे की, मी अल्लाह् जवळ प्रिय आणि सन्मानीत आहे. मला मूसा عليه السلام ची गोष्ट मानण्याची काय आवश्यकता आहे; तात्पर्य, त्याला त्याच्या खजीने आणि महाला समवेत, जमिनीत धसवून टाकण्यात आले.

७) हा फिरऔन आहे. जो इजिप्त देशाचा सत्ताधीश होता. परंतु मर्यादेच्या पुढे जाऊन, त्याने आपल्या बाबतीत,

आपणच अल्लाह् असल्याचा दावा पण करुन दिला. ह. मूसा عليه السلام वर ईमान आणण्यापासून, आणि त्यांचे लोक, बनी इस्साईलला, ज्यांना त्याने गुलाम बनवून ठेवले होते, स्वतंत्र करुन देण्याला, नाकारले होते. सरशेवटी एका सकाळी त्याला, त्याच्या संपूर्ण सैन्यासह, 'कुलजम्'च्या समुद्रात, बुडवून टाकण्यात आले.

८) म्हणजे ही अल्लाहची शान नाही, की, त्याने जुलूम करावा. म्हणून मागील लोकसमूह, ज्यांच्यावर शिक्षा आल्या, निव्वळ यासाठी नष्ट झाले की, कुफ्र आणि शिर्क, आणि खोटे ठरवणे आणि अपराध करणे, यांचा अंगीकार करुन, त्यांनी स्वत:च आपल्या जिवावर जुलूम केला होता.

९) म्हणजे ज्याप्रमाणे कोळ्याचे जाळे, (घर) फारच हलके, कमजोर आणि पाया नसलेले असते, हाताच्या मामुली इशाऱ्याने ते नाहीसे होऊन जाते. अल्लाह्च्या शिवाय दुसऱ्यांना आपला उपास्य, इच्छापूर्ती करणारा, संकट विमोचक समजणे पण, बिलकुल असेच आहे, म्हणजे बिलकुल काही फायदा देणारे नाही. कारण ते पण कोणाच्या काही कामा येऊ शकत नाहीत. म्हणून अल्लाह् शिवाय इतरांचे आश्रय पण, कोळ्याच्या जाळ्याप्रमाणे, पायेदार नाहीत. जर हे फायदेकारक आणि पायेदार असते, तर हे, उपास्य, मागील लोकांना नष्ट होण्यापासून वांचवून घेते. परंतु जगाने पाहून घेतले की, ते त्यांना वाचवू शकले नाहीत.

१०) म्हणजे त्यांना गफलतीच्या झोपेतून जागे करणे, शिर्कच्या वास्तविकतेची, जाणीव करुन देणे, आणि हिदायतचा मार्ग समजाऊन सांगण्यासाठी.

११) या ज्ञानाने अभिप्रेत, अल्लाह्चे त्याच्या धर्मशास्त्राचे आणि त्याच्या निशाण्या आणि प्रमाणांचे ज्ञान आहे. ज्याच्यावर मनन चिंतन केल्याने, अल्लाह्ची ओळख पटते. आणि हिदायतचा मार्ग मिळतो.

१२) म्हणजे निरर्थक आणि निरुद्देश्य नाही.

१३) म्हणजे अल्लाह्च्या अस्तित्वाचे, त्याचे सामर्थ्य आणि ज्ञान व बुध्दीमत्तेचे, आणि मग याच प्रमाणाने, ते या परिणामावर पोहचतात की, ब्रह्मांडात त्यांच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. कोणी इच्छापूर्ती करणारा व संकटविमोचक नाही.

اُتْلُ مَآ اُوْحِيَ اِلَيْكَ مِنَ الْكِتٰبِ وَاَقِمِ الصَّلٰوةَ ؕ اِنَّ الصَّلٰوةَ تَنْهٰى عَنِ الْفَحْشَآءِ وَالْمُنْكَرِ ؕ وَلَذِكْرُ اللّٰهِ اَكْبَرُ ؕ وَاللّٰهُ يَعْلَمُ مَا تَصْنَعُوْنَ ﴿٤٥﴾

जे पुस्तक आपल्याकडे वह्य केले गेले आहे, त्याला वाचा; [१] आणि नमाज नित्य नियमाने पढत रहा. [२] खचितच नमाज निर्लज्ञपणा आणि वाईट (कामे) यापासून अटकाव करते; [३] नि:संशय अल्लाहचे स्मरण ही फार मोठी गोष्ट आहे; [४] आणि जे काही तुम्ही करता, ते अल्लाहतआला जाणतो ४५

وَلَا تُجَادِلُوْٓا اَهْلَ الْكِتٰبِ اِلَّا بِالَّتِيْ هِيَ اَحْسَنُ ۖ اِلَّا الَّذِيْنَ ظَلَمُوْا مِنْهُمْ وَقُوْلُوْٓا اٰمَنَّا بِالَّذِيْٓ اُنْزِلَ اِلَيْنَا وَاُنْزِلَ اِلَيْكُمْ وَاِلٰهُنَا وَاِلٰهُكُمْ وَاحِدٌ وَّنَحْنُ لَهٗ مُسْلِمُوْنَ ﴿٤٦﴾

आणि ग्रंथधारी लोकांबरोबर, वादविवाद करू नका परंतु चांगल्या पद्धतीने. [५] परंतु त्यांच्याबरोबर जे त्यांच्यातून अन्यायी असतील; [६] आणि स्पष्ट जाहीर करून टाका की, आमचे तर त्या पुस्तकावर पण ईमान आहे, जे आमच्यावर उतारण्यांत आले आहे; आणि त्याच्यावर सुद्धा, जे तुमच्यावर अवतरीत केले गेले आहे. [७] आमचा तुमचा उपास्य एकच आहे. आम्ही सर्व त्याचेच आज्ञाधारक आहोत ४६

وَكَذٰلِكَ اَنْزَلْنَآ اِلَيْكَ الْكِتٰبَ ؕ فَالَّذِيْنَ اٰتَيْنٰهُمُ الْكِتٰبَ يُؤْمِنُوْنَ بِهٖ ۚ وَمِنْ هٰٓؤُلَآءِ مَنْ يُّؤْمِنُ بِهٖ ؕ وَمَا يَجْحَدُ بِاٰيٰتِنَآ اِلَّا الْكٰفِرُوْنَ ﴿٤٧﴾

आणि आम्ही अशाचप्रकारे तुम्हाकडे आपले पुस्तक अवतरीत केले आहे, मग ज्यांना आम्ही पुस्तक दिले आहे, ते याच्यावर ईमान आणतात. [८] आणि यांच्यातून (म्हणजे मूर्तीपुजक अरबांमधून) कांही यावर ईमान ठेवतात. [९] आणि आमच्या निशाण्यांना फक्त काफिरच नाकारतात ४७

وَمَا كُنْتَ تَتْلُوْا مِنْ قَبْلِهٖ مِنْ كِتٰبٍ وَّلَا تَخُطُّهٗ بِيَمِيْنِكَ اِذًا لَّارْتَابَ الْمُبْطِلُوْنَ ﴿٤٨﴾

आणि याच्यापूर्वी तर तुम्ही कोणी पुस्तक वाचित नव्हता. [१०] आणि न कोण्या पुस्तकाला आपल्या हाताने लिहीत होते [११] की, हे खोटारडे लोक शंके कुशंकेत पडले असते. [१२] ४८

بَلْ هُوَ اٰيٰتٌۢ بَيِّنٰتٌ فِيْ صُدُوْرِ الَّذِيْنَ اُوْتُوا الْعِلْمَ ؕ وَمَا يَجْحَدُ بِاٰيٰتِنَآ اِلَّا الظّٰلِمُوْنَ ﴿٤٩﴾

किंबहुना हे (कुरआन) तर, स्पष्ट महावाक्ये आहेत, जी ज्ञानी लोकांच्या अंत:करणात सुरक्षित आहेत; [१३] आमच्या महावाक्यांना न मानणारे, अन्यायी लोकांशिवाय आणखी कोणी नाही. ४९

وَقَالُوْا لَوْلَآ اُنْزِلَ عَلَيْهِ اٰيٰتٌ مِّنْ رَّبِّهٖ ؕ قُلْ اِنَّمَا الْاٰيٰتُ عِنْدَ اللّٰهِ ؕ وَاِنَّمَآ اَنَا نَذِيْرٌ مُّبِيْنٌ ﴿٥٠﴾

आणि ते म्हणतात की, याच्यावर, याच्या पालनकर्त्याकडून, काही चमत्कार का म्हणून उतारले गेले नाहीत? आपण सांगून द्या की, सर्व प्रमाणे अल्लाहच्या जवळ आहेत. [१४] माझी स्थिती तर फक्त स्पष्टपणे सावध करून देणाऱ्याची आहे. ५०

१) कुरआन करीमचे वाचन निरनिराळ्या उद्देश्याने वांछनीय आहे. निव्वळ त्याच्या बदला आणि पुण्य फळासाठी, त्याच्या अर्थ आणि भावार्थावर विचार करण्यासाठी, शिक्षण आणि ट्रेनिंगसाठी, आणि प्रवचन व हितोपदेशासाठी या वाचनाच्या हुकूमात हे सर्व प्रकार शामील आहेत.

२) कारण की, नमाजीने, (या अटीवर की ती नमाज असावी) मनुष्याचा संबंध खास म्हणून अल्लाहतआलाशी कायम होऊन जातो. ज्यामुळे मनुष्याला अल्लाहतआलाची मदत प्राप्त होते; जी जीवनाच्या प्रत्येक वळणावर, त्याच्या इराद्या आणि स्थैर्याला कारणीभूत, आणि हिदायतचे साधन सिद्ध होते. याचसाठी, कुरआन करीममध्ये, सांगण्यांत आले आहे, ''अहो ईमानवाल्यांनो! सहनशिलता आणि नमाजीने मदत प्राप्त करा.'' (सू.बकर : १५३) नमाज आणि सहनशिलता या काही, दिसणाऱ्या वस्तूंतर नाही, की मनुष्य त्यांचा आश्रय घेऊन, त्यांच्यापासून मदत मिळवेल. ही तर न दिसणारी वस्तू आहे. अर्थ हा आहे की, यांच्या मार्फत मनुष्याचा, आपल्या पालनकर्त्याबरोबर जो विशेष संबंध प्रस्थापित होऊन जातो, तो पावला पावलावर त्याचा हात धरून, त्याला मार्ग दाखवितो. याचसाठी नबी ﷺ ला, रात्रीच्या एकांतात, तहज्जुदची नमाज पण पढण्याची ताकीद केली गेली. कारण की, आपल्यावर जे महान कार्य सोपविण्यांत आले होते, याच्यात आपणास अल्लाहच्या मदतीची फार आवश्यकता होती; आणि हेच कारण आहे की, स्वत: आँ हजरत, ﷺ ला पण जेव्हा कोणी महत्त्वाचा प्रसंग पुढे येई, तेव्हा आपण नमाजीची (म्हणजे पढण्याची) व्यवस्था करीत.

३) म्हणजे निर्लज्जपणा आणि वाईट कामांना अटकाव करण्याचे सबब आणि साधन बनते. ज्याप्रमाणे औषधांचे

वेगवेगळे परिणाम आहेत, आणि सांगण्यात येते की अमुक आणि अमुक आजाराला प्रतिबंध करतात; आणि खरोखर असे होते; परंतु केव्हा? जेव्हा दोन गोष्टींचे पालन केले जाईल. एक औषधाला नियमितपणे, अशा पद्धतीने, आणि अर्टीसह, उपयोगांत आणले जावे, जे हकीम आणि डॉक्टर सांगेन. दुसरे पथ्य, म्हणजे अशा गोष्टींपासून वांचले जावे, ज्या या औषधाच्या परिणामाला घालवणाऱ्या असतील. अशाच प्रकारे नमाजीमध्ये सुद्धां, अल्लाहतआलाने असे आत्मिकबळ ठेवले आहे, की ही मनुष्याला निर्लज्जपणा आणि वाईट कामांपासून अटकाव करते. पण त्याच वेळी, जेव्हा नमाजीला नबी करीम ﷺ च्या सुन्नतप्रमाणे, त्या नियम आणि अर्टीसह, पढले जावे, जे तिच्या ठीक होण्याला, आणि ती कबूल होण्याला, आवश्यक आहेत. उदाहरणार्थ, पहिली गोष्ट तिच्यासाठी निखालस वृत्ती आहे. त्याच्यानंतर चित्त शुद्धी, म्हणजे अल्लाहच्या शिवाय, कोण्या दुसऱ्याकडे लक्ष नसावे. तिसरी गोष्ट जमाअतीसह, निश्चित केलेल्या वेळेवर, तिच्या पढण्याचा बंदोबस्त करणे. चौथी गोष्ट, नमाजीची अंगे, (किराअत, रूकुअ, कौमा, सजदा, वगैरे) या मध्ये संतुलन आणि समाधान, पांचवी गोष्ट, विनयता व व्याकुळता (खुजुअ) आणि रडण्यासारखी अवस्था. सहावे, नियमित पणे इचे पढणे, सातवे, हलाल रोजीचाच उपयोग करणे. आमच्या नमाजी या अटीं आणि शर्तींपासून रिक्त आहेत; त्यासाठी तिचे परिणाम सुद्धा, आमच्या जीवनांत जाहीर होत नाहीत, जे कुरआन करीममध्ये सांगण्यांत आले आहेत. काहींनी याचा अर्थ हुकूमाचा घेतला आहे. म्हणजे नमाज पढणाऱ्याला पाहिजे की, त्याने निर्लज्जपणाची कामे आणि वाईट गोष्टी, यापासून स्वत:ला वांचवावे.

४) म्हणजे निर्लज्जपणा आणि वाईट कामांपासून अडविण्यांत, अल्लाहचे स्मरण, नमाजीच्या कायम करण्यापेक्षा सुद्धां जास्त परिणामकारक आहे. यासाठी की, मनुष्य जोपर्यंत नमाजीत असतो, वाईट कामांपासून थांबलेला असतो. पण नंतर याचा परिणाम कमी होऊन जातो. याच्या उलट, नेहमी अल्लाहचे स्मरण करणे, त्याच्या करीतां वाईट गोष्टी करण्यांस प्रतिबंध करते.

५) यासाठी की ते बुद्धी आणि समज बाळगणारे आहेत; गोष्टीला समजण्याची क्षमता, आणि योग्यता त्यांच्या ठाई असते. या कारणाने त्यांच्याशी वादविवाद आणि संभाषण करतांना, कडव्या आणि सहन न होणाऱ्या गोष्टी, आणि जोर जोराने बोलणे योग्य नाही.

६) म्हणजे जो वादविवाद आणि भांडणांत, मर्यादेच्या पुढे जाईल, तर तुम्हास पण कडक भाषा आणि रवैया, अंगीकारण्याची परवानगी आहे. काहींनी पहिल्या समूहाने अभिप्रेत, ग्रंथधारी लोक धरले आहेत, जे मुसलमान होऊन गेले होते. आणि दुसऱ्या समूहाने त्या व्यक्ती, ज्या मुसलमान झाल्या नव्हत्या किंबहुना यहूदींवर, आणि खिस्तीत्वावर कायम राहिले, आणि काहींनी 'जलमू मिनहुम' चा मिसदाक, त्या ग्रंथधारी लोकांना धरला आहे, जे मुसलमानांच्या विरूद्ध, नुकसान पोहचविण्यांत प्रयत्नशील असत. आणि युद्ध करण्याला पण उत्सुक असत. त्यांच्या बरोबर तुम्ही पण युद्ध करा, येथपावेतो की, ते मुसलमान होऊन जातील. किंवा जिझीया देतील.

७) म्हणजे तौरात आणि इंजीलवर; म्हणजे ही पण अल्लाहकडून अवतरीत झालेली आहेत; आणि हे की, ही इस्लामी धर्मशास्त्राला कायम करणारी, आणि ह.मोहम्मद ﷺ च्या उदयापर्यंत, अल्लाहचे धर्मशास्त्र आहेत.

८) याच्याने अभिप्रेत अब्दुल्लाह् बिन सलाम, वगैरे आहेत. 'ईताई किताब' ने अभिप्रेत त्यांवर अंमलबजावणी करणे आहे. जणूं यावर जे कर्म करीत नाही, त्यांना हे पुस्तक दिलेच गेले नाही.

९) याच्याने अभिप्रेत मक्केवाले आहेत; ज्यांच्यातून काही लोक ईमान घेऊन आले होते.

१०) यासाठी की, निरक्षर होते.

११) यासाठी की, लिहण्यासाठी पण, ज्ञान आवश्यक आहे. जे आपण ﷺ नी कोणापासून प्राप्त केले नव्हते.

१२) म्हणजे जर आपण ﷺ शिकले संवरलेले असते, किंवा कोण्या गुरूंकडून काही शिकले असते, तर लोक म्हणते की, हे कुरआन मजीद, अमक्याच्या मदतीने, किंवा, त्याच्यापासून शिकवण घेण्याचा परिणाम आहे.

१३) म्हणजे कुरआन मजीदच्या, पाठ केलेल्या, लोकांच्या अंत:करणांत. हे कुरआन मजीद चे वैशिष्टय आहे की, कुरआन मजीदचा एक एक शब्द, अंत:करणात, सुरक्षित होऊन जातो.

१४) म्हणजे हे चमत्कार, त्याची बुद्धिमत्ता आणि मर्जी, ज्या सेवकांवर उतारण्याचा तगादा करते, तेथे तो उतारतो. याच्यांत अल्लाहच्या शिवाय कोणाचा अधिकार नाही.

اَوَلَمْ يَكْفِهِمْ اَنَّآ اَنْزَلْنَا عَلَيْكَ الْكِتٰبَ يُتْلٰى عَلَيْهِمْ ؕ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَرَحْمَةً وَّذِكْرٰى لِقَوْمٍ يُّؤْمِنُوْنَ ﴿٥١﴾

काय त्यांना हे पुरेसे नाही? की आम्ही तुमच्यावर पुस्तक अवतरीत करून दिले, जे यांच्यासमोर वांचले जात आहे. [१] यांत रहमत आहे, आणि उपदेश (पण) आहे, त्या लोकांकरीतां जे ईमानवाले आहेत [२] ५१

قُلْ كَفٰى بِاللّٰهِ بَيْنِيْ وَبَيْنَكُمْ شَهِيْدًا ۚ يَعْلَمُ مَا فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا بِالْبَاطِلِ وَكَفَرُوْا بِاللّٰهِ ۙ اُولٰٓئِكَ هُمُ الْخٰسِرُوْنَ ﴿٥٢﴾

(आपण) सांगून द्या की, माझ्यांत आणि तुमच्यांत, अल्लाहचे साक्षीदार होणे पर्याप्त आहे. [३] तो आकाश आणि पृथ्वीच्या प्रत्येक वस्तुचा जाणणारा आहे. जे लोक खोट्याला मानणारे आणि अल्लाहतआलाला नाकारणारे आहेत, [४] ते भयंकर नुकसानांत आणि तोट्यांत आहेत [५] ५२

وَيَسْتَعْجِلُوْنَكَ بِالْعَذَابِ ؕ وَلَوْلَآ اَجَلٌ مُّسَمًّى لَّجَآءَهُمُ الْعَذَابُ ؕ وَلَيَاْتِيَنَّهُمْ بَغْتَةً وَّهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ﴿٥٣﴾

आणि हे लोक आपल्याजवळ, शिक्षेसाठी घाई मचवीत आहे [६] जर माझ्याकडून निश्चित केलेला वेळ नसतां, तर आतांपर्यंत, यांच्याजवळ शिक्षा येऊन पोहचल्या असत्या. [७] ही खात्रीलायक गोष्ट आहे की, अचानक ते सावध नसतांना, त्यांच्या जवळ शिक्षा येऊन पोहचेल, [८] ५३

يَسْتَعْجِلُوْنَكَ بِالْعَذَابِ ؕ وَاِنَّ جَهَنَّمَ لَمُحِيْطَةٌۢ بِالْكٰفِرِيْنَ ﴿٥٤﴾

हे शिक्षेसाठी घाई मचवीत आहे. आणि (निश्चित रहा) नरकाग्नी काफिरांना घेरून घेणार आहे. [९] ५४

يَوْمَ يَغْشٰهُمُ الْعَذَابُ مِنْ فَوْقِهِمْ وَمِنْ تَحْتِ اَرْجُلِهِمْ وَيَقُوْلُ ذُوْقُوْا مَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ﴿٥٥﴾

त्या दिवशी, त्यांच्या वरून खालून, त्यांना शिक्षा झांकून टाकतील. आणि (अल्लाहतआला म्हणेल) [१०] की आता आपल्या (कु) कर्मांची गोडी चाखा ५५

१) म्हणजे ते चमत्कार मागतात, काय त्यांच्याकरीता चमत्कार म्हणून हे कुरआन पुरेसे नाही? जे आम्ही आपणांवर अवतरीत केले आहे. आणि ज्याच्या बाबतीत त्यांना आव्हान दिले आहे की, यासारखे कुरआन आणून दाखवा किंवा, एक अध्यायच बनवून सादर करून द्यावा. जेव्हां कुरआन चमत्कार असून सुद्धा, ते यावर ईमान आणित नाहीत; तर ह.ईसा व ह.मूसा अलैहिमुस् सलामप्रमाणे त्यांना चमत्कार दाखवून पण दिले गेले, तर यावर हे कोणते ईमान घेऊन येतील?

२) म्हणजे या लोकांसाठी, जे या गोष्टीला मान्य करतात की, हे कुरआन अल्लाहकडून आलेले आहे. कारण तेच याच्यापासून फायदा व लाभ उचलणारे असतात.

३) या गोष्टीवर की, मी अल्लाहचा पैगंबर आहे, आणि जे पुस्तक माझ्यावर अवतरीत झाले आहे, ते खचित्‌च अल्लाहकडून आहे.

४) म्हणजे अल्लाहशिवाय इतरांना, उपासनेला पात्र ठरवितात, आणि जो खरोखर उपासनेला पात्र आहे म्हणजे अल्लाहतआला,! त्याचा इन्कार करतात.

५) कारण की हेच लोक बुद्धीच्या फिसादात, आणि चुकीच्या समजुतीत, व्यस्त आहेत. म्हणूनच त्यांनी जो सौदा केला आहे की, ईमानच्या बदल्यांत कुफ्र, आणि हिदायतच्या बदल्यांत बहकणे विकत घेतले आहे, याच्यांत ते नुकसान उचलणारे आहेत.

६) म्हणजे पैगंबराची गोष्ट मानण्याऐवजी, म्हणतात की, जर तू खरा आहेस, तर आमच्यावर शिक्षा अवतरीत करून दे.

७) म्हणजे यांची कर्मे आणि बोल, तर खचित्‌च या लायकीचे आहेत की, ताबडतोब त्यांचे अस्तित्व मिटवून टाकण्यात यावे. परंतु आमची पद्धत आहे की, आम्ही लोकांना एका निश्चित वेळे पावेतो सवलत देतो. मग जेव्हा ती कर्मांची सवलत संपून जाते तेव्हा आमची शिक्षा येऊन लागते.

८) म्हणजे जेव्हां शिक्षेचा निश्चित वेळ येऊन लागेल, तर अशाप्रकारे अचानक येईल, की, त्यांना कळणार सुद्धां नाही. ही निश्चित वेळ ती आहे, जी त्याने मक्कावाल्यांसाठी लिहून ठेवली होती; म्हणजे बद्रच्या युद्धांत, कैद आणि ठार होणे. किंवा मग कयामतचे घडून येणे आहे, ज्याच्यानंतर काफिरांसाठी शिक्षाच शिक्षा आहे.

९) पहिला 'यस्तअजिलूनका' बातमी म्हणून आहे. आणि दुसरा आश्चर्य म्हणून आहे. म्हणजे ही गोष्ट आश्चर्यजनक आहे की, शिक्षेचे ठिकाण (नरकाग्नी) ने, त्यांना आपल्या घेऱ्यांत घेतलेले आहे. तरी सुद्धां हे शिक्षेकरतां घाई करीत आहेत. वास्तविक प्रत्येक येणारी वस्तू, जवळच असते. तिला दूर का समजतात? किंवा मग ही पुनरावृत्ती ताकीद म्हणून आहे.

१०) 'यकूल' चा फाईल अल्लाह आहे, किंवा देवदूत. म्हणजे जेव्हा चारही बाजूने त्यांना शिक्षा होत असेल, तेव्हां म्हणण्यात येईल.

يٰعِبَادِيَ الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِنَّ اَرْضِيْ وَاسِعَةٌ فَاِيَّايَ فَاعْبُدُوْنِ ﴿٥٦﴾

**हे माझ्या ईमानवाल्या सेवकांनो ! माझी जमीन फार विस्तृत आहे, तर तुम्ही माझीच उपासना करा.[१] ५६**

كُلُّ نَفْسٍ ذَآئِقَةُ الْمَوْتِ ثُمَّ اِلَيْنَا تُرْجَعُوْنَ ﴿٥٧﴾

**प्रत्येक जीवधारी मृत्यूची गोडी चाखणार आहे. आणि तुम्ही सर्व, आमच्याच कडे परतवून आणले जाल[२] ५७**

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَنُبَوِّئَنَّهُمْ مِّنَ الْجَنَّةِ غُرَفًا تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا نِعْمَ اَجْرُ الْعٰمِلِيْنَ ﴿٥٨﴾

**आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कर्मे केलीत आम्ही त्यांना स्वर्गाच्या उच्च भवनांत जागा देऊं, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वाहत आहेत.[३] जेथे ते नेहमी राहतील.[४] (सत्) कर्मे करणाऱ्याचे हे किती उत्तम फळ आहे. ५८**

الَّذِيْنَ صَبَرُوْا وَعَلٰى رَبِّهِمْ يَتَوَكَّلُوْنَ ﴿٥٩﴾

**ते, ज्यांनी सहनशिलता पत्करली,[५] आणि आपल्या पालनकर्त्यावर भरोसा ठेवतात[६] ५९**

وَكَاَيِّنْ مِّنْ دَآبَّةٍ لَّا تَحْمِلُ رِزْقَهَا اللّٰهُ يَرْزُقُهَا وَاِيَّاكُمْ وَهُوَ السَّمِيْعُ الْعَلِيْمُ ﴿٦٠﴾

**आणि पुष्कळसे[७] प्राणी आहेत, जे आपली अन्नसंपत्ती घेऊन फिरत नाहीत;[८] त्या सर्वांस आणि तुम्हांस देखील, अल्लाहतआलाच रोजी देतो;[९] तो मोठाच ऐकणारा आणि जाणणारा आहे.[१०] ६०**

१) याच्यात अशा जागेहून, जेथे अल्लाहची ईबादत करणे कठीण असावे; आणि धर्मावर जमून रहाणे कठीण होत असेल, हिजरत करण्याचा हुकूम आहे. ज्याप्रमाणे पहिले मुसलमानांनी मक्केहून हबशाकडे, आणि मग नंतर, मदीनेकडे हिजरत केली.

२) म्हणजे मृत्यूचा कडू प्याला तर प्रत्येकाला आवश्यक पिणे आहे. हिजरत कराल तरी सुद्धां, आणि न कराल तरी सुद्धां. म्हणून तुम्हांस जन्मभूमीचे नातेवाईकांचे आणि मित्र मंडळीचे सोडणे, कठीण वाटावयांस नको. मृत्यु, तर तुम्ही जेथे कोठे असाल, येऊनच जाईल. तथापि अल्लाहची उपासना करत असतां, तुम्ही मराल, तर तुम्ही परलोकांतील देणग्यांनी यशस्वी व्हाल; यासाठी की मरून तर अल्लाहच्याच जवळ जाणे आहे.

३) म्हणजे स्वर्गवाल्यांची घरे उंच असतील. ज्यांच्याखाली पाट वहात असतील. हे पाट, पाणी, पेये, मध आणि दुधाचे असतील. याशिवाय त्यांना जिकडे फिरवू इच्छतील, त्यांचे वहाणे तिकडे होऊन जाईल.

४) न त्यांना उतरत्या कळेचा धोका असेल, न त्यांना मृत्युचे भय, आणि न कोण्या आणखी जागी स्थलांतरीत होण्याचे भय.

५) म्हणजे धर्मावर मजबुतीने कायम राहिले, हिजरतचा त्रास सहन केला, बाल बच्च्यांपासून प्रिय नातेवाईकांपासून, दूर जाण्याला, केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी सहन केले.

६) धर्म आणि ऐहिक सर्व मामल्यांना आणि परिस्थितीत.

७) 'कअय्यीन्' मध्ये 'काफ' उपमा देण्याचा आहे. आणि अर्थ आहे, कित्येक, किंवा पुष्कळसे.

८) कारण की, उचलून घेऊन जाण्याची, त्यांच्यात हिंमतच होत नाही. अशाच प्रकारे ते सांठवणुक पण करूंशकत नाही. अर्थ हा आहे की, अन्नसंपत्तीचे कोण्या खास जागेशी संबंधीत नाही, किंबहुना अल्लाहची अन्नसंपत्ती आपल्या निर्मिती (सृष्टी) साठी सार्वत्रिक आहे; तो कोणीपण असो आणि कोठेपण असो; किंबहुना अल्लाहतआलाने हिजरत करून जाणाऱ्या सहाबांना, पूर्वीपेक्षा कितीतरी जास्त, मोठी आणि पवित्र अन्नसंपत्ती दिली. तसेच अगदी थोड्या कालावधीनंतर, त्यांना अरबस्थानच्या वेगवेगळ्या इलाख्यांचा सत्ताधीश बनवूंन दिले. रजीय अल्लाहु, अन्हुम अजमईन.

९) म्हणजे कोणी दुर्बल आहे, किंवा शक्तीवान, साधन सामुग्रीने संपन्न आहे किंवा रिक्त, आपल्या जन्मभूमीत आहे किंवा, हिजरत करून आलेला, ज्याला स्वत:ची जन्मभूमी नाही. सर्वांना अन्नसंपत्ती देणारा तोच अल्लाह आहे; जो मुंग्यांना जमिनीच्या कानाकोपऱ्यांतून, पक्ष्यांना हवेमधून, आणि माश्यांना आणि दुसऱ्या जलचर प्राण्यांना, समुद्राच्या खोलीत, रोजी पोहचवितो. या प्रसंगी अर्थ हा आहे की, दारिद्र्य आणि उपासमारीची भीती, हिजरत करण्यांस आडवी येऊं नये. यासाठी की, अल्लाहतआला तुमच्या आणि सर्व सृष्टीला अन्नसंपत्ती पुरविण्याला जबाबदार आहे.

१०) तो जाणणारा आहे, तुमच्या कामांना आणि कर्तृत्वाला; आणि तुमच्या उघड आणि गुप्त गोष्टींना. म्हणून फक्त त्यालाच भ्या. त्याच्याशिवाय कोणाला भिऊ नका! याच्याच आज्ञापालनांत सद्‌भाग्य आणि कमाल आहे. आणि त्याच्या आज्ञाभंगात, दुर्भाग्य आणि नुकसान.

وَلَئِنْ سَاَلْتَهُمْ مَّنْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ وَسَخَّرَ الشَّمْسَ وَالْقَمَرَ لَيَقُوْلُنَّ اللّٰهُ ۚ فَاَنّٰى يُؤْفَكُوْنَ ﴿٦١﴾

आणि जर आपण त्यांना विचाराल की, पृथ्वी आणि आकाशाचा निर्माता, आणि सूर्य आणि चंद्रास काम लावणारा, कोण आहे? तर त्यांचे उत्तर हेच असेल की, अल्लाहतआला![१] मग कोठे बहकले चालले जात आहेत?[२] ६१

اَللّٰهُ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ وَيَقْدِرُ لَهٗ ۗ اِنَّ اللّٰهَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿٦٢﴾

अल्लाहतआला आपल्या सेवकांमधून ज्याला इच्छितो, विपुल अन्नसंपत्ती देतो, आणि ज्याला इच्छितो (त्याला) काटकसरीने;[३] खचित्‌च अल्लाहतआला, प्रत्येक गोष्टीचा जाणणारा आहे.[४] ६२

وَلَئِنْ سَاَلْتَهُمْ مَّنْ نَّزَّلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً فَاَحْيَا بِهِ الْاَرْضَ مِنْۢ بَعْدِ مَوْتِهَا لَيَقُوْلُنَّ اللّٰهُ ۗ قُلِ الْحَمْدُ لِلّٰهِ ۗ بَلْ اَكْثَرُهُمْ لَا يَعْقِلُوْنَ ﴿٦٣﴾

आणि जर आपण त्यांस विचाराल की, आकाशांतून पाणी उतारून, जमिनीला तिच्या मृत झाल्या पश्चात, जिवंत करून देणारा कोण आहे? तर खचित्‌च यांचे उत्तर हे असेल (की) अल्लाहतआला ! आपण बोला की सर्व स्तुती अल्लाहलाच योग्य आहे. होय ! (परंतु) यांच्यातून बहुतेक बुद्धीहीन आहेत.[५] ६३

وَمَا هٰذِهِ الْحَيٰوةُ الدُّنْيَآ اِلَّا لَهْوٌ وَّلَعِبٌ ۗ وَاِنَّ الدَّارَ الْاٰخِرَةَ لَهِيَ الْحَيَوَانُ ۘ لَوْ كَانُوْا يَعْلَمُوْنَ ﴿٦٤﴾

आणि जगांतील हे जीवन तर निव्वळ खेळ तमाशा आहे.[६] तथापि खरे जीवन तर, परलोकातील घर आहे.[७] जर हे समजते.[८] ६४

فَاِذَا رَكِبُوْا فِى الْفُلْكِ دَعَوُا اللّٰهَ مُخْلِصِيْنَ لَهُ الدِّيْنَ ۚ فَلَمَّا نَجّٰىهُمْ اِلَى الْبَرِّ اِذَا هُمْ يُشْرِكُوْنَ ﴿٦٥﴾

मग जेव्हां हे लोक नावेत स्वार होतात, तेव्हांअल्लाहतआलालाच बोलावितात, त्याच्याचसाठी भक्तीला निखालस करून; मग जेव्हां तो त्यांना जमिनीकडे वांचवून घेऊन येतो, तर त्याचवेळी शिर्क करूं लागतात[९] ६५

لِيَكْفُرُوْا بِمَآ اٰتَيْنٰهُمْ ۚ وَلِيَتَمَتَّعُوْا ۗ فَسَوْفَ يَعْلَمُوْنَ ﴿٦٦﴾

म्हणजे आम्ही दिलेल्या देणग्यांशी कृतघ्नता करावी, आणि त्यांचा सुखोपभोग घेत रहावा.[१०] त्यांना लवकरच कळून येईल ६६

اَوَلَمْ يَرَوْا اَنَّا جَعَلْنَا حَرَمًا اٰمِنًا وَّيُتَخَطَّفُ النَّاسُ مِنْ حَوْلِهِمْ ۗ اَفَبِالْبَاطِلِ يُؤْمِنُوْنَ وَبِنِعْمَةِ اللّٰهِ يَكْفُرُوْنَ ﴿٦٧﴾

काय हे पहात नाही की, आम्ही पवित्र क्षेत्राला शांततामय बनवून दिले आहे. वास्तविक त्याच्या आजुबाजूचे लोक लुबाडले जात आहे;[११] कां हे खोट्यावर तर विश्वास ठेवतात, आणि अल्लाहतआलाच्या देणग्यांवर कृतघ्नता करतात?[१२] ६७

وَمَنْ اَظْلَمُ مِمَّنِ افْتَرٰى عَلَى اللّٰهِ كَذِبًا اَوْ كَذَّبَ بِالْحَقِّ لَمَّا جَآءَهٗ ۗ اَلَيْسَ فِيْ جَهَنَّمَ مَثْوًى لِّلْكٰفِرِيْنَ ﴿٦٨﴾

आणि त्याच्यापेक्षांही आणखी जालीम कोण असेल? जो अल्लाहवर खोटा आळ घेईल;[१३] किंवा जेव्हा सत्य याच्याजवळ येऊन पोहचेल, तो त्याला[१४] खोटे म्हणेन; काय अशा काफिरांचे ठिकाण नरकाग्नी होणार नाही. ६८

وَالَّذِيْنَ جَاهَدُوْا فِيْنَا لَنَهْدِيَنَّهُمْ سُبُلَنَا ۗ وَاِنَّ اللّٰهَ لَمَعَ الْمُحْسِنِيْنَ ﴿٦٩﴾

आणि जे लोक आमच्या मार्गांत जिहाद (कोशिस) करतात,[१५] आम्ही त्यांना आमचे मार्ग जरूर दाखवून देऊं;[१६] खचित्‌च अल्लाहतआला सुकृत्ये करणारांचा साथी आहे.[१७] ६९

१) म्हणजे हे मुशरिक लोक, जे मुसलमानांना निव्वळ एकेश्वरवादाच्या कारणे, त्रास देत आहेत, त्यांना जर विचारण्यांत येईल की, आकाश आणि पृथ्वीला, शुन्यांतून अस्तित्वांत आणणारा, आणि सूर्य आणि चंद्राला आपआपल्या कक्षेत चालविणारा कोण आहे? तर तेथे हे मान्य केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नाही, की हे सर्व काही करणारा अल्लाह आहे.

२)म्हणजे प्रमाणे, आणि मान्य करून सुद्धा, यांचे सत्त्यापासून पळ काढणे, आश्चर्यजनक आहे.

३) हे मुशरिक लोकांच्या आक्षेप घेण्याचे, उत्तर आहे. जो ते मुसलमानांवर घेत होते; की जर तुम्ही सत्त्यावर आहात तर गरीब आणि दुर्बल कांआहात ? अल्लाहने सांगितले की, रोजीची विपुलता आणि कमी अल्लाहच्या अधिकारांत आहे. तो आपल्या प्रयुक्ती आणि मर्जीप्रमाणे, ज्याला इच्छितो त्याला कमी किंवा जास्त देतो. याचा संबंध त्याच्या प्रसन्नतेशी

किंवा प्रकोपाशी नाही.
४) याला पण तोच जाणतो की, जास्त अन्न संपत्ती, कोणासाठी उत्तम आहे, आणि कोणासाठी नाही ?
५) कारण की जर अक्कल असती, तर आपल्या पालनकर्त्याबरोबर, दगडांना आणि मृतांना पालनकर्ता बनविले नसते; न त्यांच्यात हा विरोधाभास असतां, की, अल्लाहच्या निर्मितीला आणि पालकत्त्वाला मान्य करून सुद्धां, मूर्त्यांना इच्छापूर्ती करणाऱ्या आणि उपासनेच्या लायक समजत आहेत.
६) म्हणजे ज्या इहलोकाने त्यांना, परलोकाकडून आंधळे, आणि त्यांच्या करीता सामुग्री जमा करण्यांपासून गाफील ठेवले आहे; तो एक खेळ तमाशाहून जास्त महत्त्व ठेवत नाही. काफिर, जगाच्या कारभारांत व्यस्त असतो. त्याच्या करितां रात्रंदिवस श्रम करतो. परंतु जेव्हां मरतो, तेव्हा खाली हात असतो. ज्याप्रमाणे मुले, दिवसभर मातीच्या घरकुलाशी, खेळतात; मग खाली हाताने घरी परतून जातात. थकव्याशिवाय त्यांना काही मिळत नाही.
७) म्हणजे अशी सुकृत्ये करावयांस हवी, ज्यांनी परलोकातील घर पूर्ण आणि सुशोभित होऊन जावे.
८) कारण की, जर त्यांनी या गोष्टीला समजून घेतले असते, तर परलोकाकडे दुर्लक्ष करून, जगांत मग्न झाले नसते. यासाठी याचा उपाय ज्ञान आहे, धर्म शास्त्राचे ज्ञान.
९) मुशरिक लोकांच्या या विरोधालापण, कुरआन करीममध्ये, अनेक ठिकाणी सांगण्यात आले आहे. या विरोधाला ह.इकरमा (ﷺ) समजून गेले होते. ज्यामुळे त्यांना इस्लाम कबूल करण्याची सुबुद्धी मिळून गेली. यांच्या बाबतीत येते की, मक्केच्या विजयानंतर, हे मक्केहून फरार होऊन गेले. यासाठी की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या, पकडीपासून, वांचून जावे. हे हब्शाला जाण्यासाठी एका नावेत बसले. नाव भोवऱ्यांत फसून गेली, तेव्हां नावेत बसलेल्या लोकांनी एक दुसऱ्यास सांगितले की, पूर्ण प्रांजळपणे अल्लाहजवळ दुआ करा. यासाठी की येथे त्याच्याशिवाय कोणी सुटका करणारा नाही. ह. इकरमा (ﷺ) नी हे एकून म्हटले की जर येथे समुद्रांत, त्याच्या शिवाय कोणी सुटका देऊं शकत नाही, तर जमिनीवर सुद्धा त्याच्या शिवाय कोणी सुटका (मुक्ती) देऊं शकत नाही. आणि त्याचवेळी अल्लाहशी करार करून घेतला की, जर मी येथून, सुखरुप किनाऱ्यावर पोहचून गेलो, तर मी मुहम्मद (ﷺ) च्या हातावर बय्‌त करून घेईन, म्हणजे मुसलमान होऊन जाईन. तात्पर्य, येथून सुटका मिळवून, त्यांनी इस्लाम कबूल करून घेतला. रज़ि. अल्लाहु अनहु (इब्ने कसीर)
१०) म्हणजे मुक्ती मिळाल्यानंतर त्यांचे शिर्क करणे, यासाठी आहे की त्यांनी देणगीप्रत कृतघ्नता करावी. आणि ऐहिक मौजमजा करीत रहावे. कारण की जर ते कृतघ्नता न दाखविते, तर प्रांजळपणा (इखलास) वर कायम रहाते. आणि फक्त एकाच उपास्याला नेहमी बोलावते. काहींच्या जवळ असा अर्थ आहे. जणूं यांचा उद्देश्य कुफ्र करणे नाही, परंतु दुसऱ्यांदा शिर्क करणाऱ्याचा परिणाम, कुठल्याही परिस्थितीत कुफ्रच आहे.
११) अल्लाहतआला त्या उपकाराची चर्चा करीत आहे, जो मक्केवाल्यांवर त्याने केला की आम्ही त्यांच्या पवित्र क्षेत्राला शांतीस्थान बनविले, ज्यांत त्यांचे राहणारे, खून आणि मारामाऱ्या, कैदी बनविणे, लुटमार वगैरेपासून सुरक्षित आहेत. जेव्हांकी, अरबस्थानचे दुसरे इलाखे या सुख शांतीपासून वंचित् आहेत. खून आणि मारामाऱ्या त्यांच्याजवळ नेहमीची बाब आणि प्रत्येक येणाऱ्या दिवसाचा खेळ तमाशा आहे.
१२) म्हणजे काय या महान देणगीचे आभार हेच आहेत की, त्यांनी अल्लाहचे सरकतदार ठरवावेत? आणि खोटे उपास्य, आणि मूर्त्यांची उपासना करीत रहावे या उपकाराचा बदला तर हा होता की ते फक्त एका अल्लाहची उपासना करते आणि याच्या पैगंबराला सत्य मानते.
१३) आणि दावा करेल की, माझ्यावर अल्लाहकडून वह्य येते. पण वास्तविक असे नसावे. किंवा कोणी हे म्हणावे की मी पण ती वस्तूं उतारूंशकतो, जी अल्लाहने उतारली आहे. हा खोटा आळ आहे; आणि दावा करणारा लबाड आहे.
१४) हे खोटे आहे. आणि असे करणारा पाखंडी. आळ घेणे खोटे ठरविणे दोन्ही, कुफ्र आहेत. ज्याची शिक्षा नरकाग्नी आहे.
१५) म्हणजे धर्मावर अंमलबजावणी करतांना ज्या अडचणी, कसोट्या आणि कठीण गोष्टी पुढे येतात.
१६) याच्याने अभिप्रेत इहलोक आणि परलोकाचे ते मार्ग आहेत, ज्यावर चालून मनुष्याला, अल्लाहची सुप्रसन्नता मिळत असते.
१७) 'एहसान' चा अर्थ अल्लाहला हजर आणि पाहणारा समजून, प्रत्येक पुण्याच्या कामाला, निखालसपणे करणे; नबी ﷺ च्या सुन्नतप्रमाणे करणे; वाईटाच्या बदल्यात वाईटा ऐवजी, चांगली वागणूक देणे; आपला हक्क सोडून देणे; आणि दुसऱ्यांना त्यांच्या हक्कापेक्षांजास्त देणे. हे सर्व 'एहसान' च्या भावार्थात शामील आहेत.

سُوْرَةُ الرُّوْمِ مَكِّيَّةٌ (٨٤) (٣٠) | اٰيَاتُهَا ٦٠ | رُكُوْعَاتُهَا ٦

## (३०) सू. अल-रुम

महावाक्ये ६० | रुकूअ ६

बِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

الٓمّٓ ﴿١﴾

***अलीफ-लाम-मीम*** (१)

غُلِبَتِ الرُّوْمُ ﴿٢﴾

**रोमन (लोक) पराभूत होऊन गेले आहेत** (२)

فِيْٓ اَدْنَى الْاَرْضِ وَهُمْ مِّنْۢ بَعْدِ غَلَبِهِمْ سَيَغْلِبُوْنَ ﴿٣﴾

**जवळच्या प्रदेशांत; आणि ते पराजीत झाल्यानंतर, लवकरच विजयी होऊन जातील** (३)

فِيْ بِضْعِ سِنِيْنَ ۗ لِلّٰهِ الْاَمْرُ مِنْ قَبْلُ وَمِنْۢ بَعْدُ ۭ وَيَوْمَىِٕذٍ يَّفْرَحُ الْمُؤْمِنُوْنَ ﴿٤﴾

**थोड्याच वर्षांत. याच्यापूर्वीही आणि याच्यानंतरही अधिकार अल्लाहतआलाचाच आहे. त्या दिवशी मुसलमान खूष होऊन जातील** (४)

بِنَصْرِ اللّٰهِ ۭ يَنْصُرُ مَنْ يَّشَاۗءُ ۭ وَهُوَ الْعَزِيْزُ الرَّحِيْمُ ﴿٥﴾

**अल्लाहच्या मदतीने; [१] तो ज्याची इच्छितो, त्याची मदत करतो; खरा प्रबळ आणि कृपाळू तोच आहे.** (५)

وَعْدَ اللّٰهِ ۭ لَا يُخْلِفُ اللّٰهُ وَعْدَهٗ وَلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُوْنَ ﴿٦﴾

**अल्लाहचे वचन आहे, [२] अल्लाहतआला आपल्या वचनाच्या विरूद्ध करीत नसतो; परंतु बहुतेक लोक समजत नाही.** (६)

يَعْلَمُوْنَ ظَاهِرًا مِّنَ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ښ وَهُمْ عَنِ الْاٰخِرَةِ هُمْ غٰفِلُوْنَ ﴿٧﴾

**ते तर (फक्त) ऐहिक जीवनाच्या बाह्य स्थितीलाच जाणतात; आणि परलोकाकडून तर फारच अजाण आहेत. [३]** (७)

१) हुजूर ﷺ च्या काळांत, दोन मोठ्या सत्ता होत्या. एक इरानची, दुसरी रोमची. पहिले उल्लेख केलेली राज्य, अग्नीपुजक आणि दुसरे, खिस्ती, म्हणजे ग्रंथधारी होते. मक्केच्या मुशरिकांची सहानुभूती, इराण बरोबर होती. कारण की ते दोघे अल्लाहच्या शिवाय इतरांचे पुजारी होते. जेव्हांकी मुसलमानांची सहानुभूती, रोमच्या खिस्ती राज्याबरोबर होती; यासाठी की, खिस्ती सुद्धां मुसलमानांसारखे ग्रंथधारी होते. आणि वह्य आणि पैगंबरीवर विश्वास ठेवत होते. त्यांचे आपसांत हाडवैर होते. नबी ﷺ च्या पैगंबरीच्या काही वर्षांनंतर असे झाले की, इराणची सत्ता, खिस्ती सत्तेवर विजयी झाली. ज्यावर मुशरिक लोकांना आनंद, आणि मुसलमानांना दु:ख झाले. या प्रसंगी कुरआन करीमचे हे महावाक्य अवतरीत झाले. ज्यांत ही भविष्यवाणी केली गेली की, थोड्या वर्षांच्या आंतच रोमन पुन्हां विजयी होऊन जातील. उघडरित्या ही भविष्यवाणी, अंमलात येण्यास अशक्य वाटत होती. तथापि मुसलमानांना, अल्लाहच्या या हुकुमामुळे विश्वास होता की, असे अवश्य होऊन राहील. म्हणूनच ह.अबुबकर सिद्दीक (رضي الله عنه) नी, अबु जहलशी, ही पैंज लावली की, रोमन पांच वर्षांच्या आंत, पुन्हा विजयी होतील. नबी ﷺ जेव्हा ही गोष्ट कळली, तेव्हां त्यांनी सांगितले की, 'बिज्अ' चा शब्द तीन ते दहाच्या संख्येसाठी वापरण्यात येतो. तुम्ही पांच वर्षाची मुदत कमी ठेवली आहे. याच्यांत वाढ करून घ्या. म्हणून आपल्या सूचनेप्रमाणे, ह.अबुबकर सिद्दीक رضي الله عنه नी या मुदतीत वाढ करून घेतली. आणि मग असेच झाले की, रोमन ९ वर्षाच्या मुदतीच्या आंत, म्हणजे सातव्या वर्षी, पुन्हा ईराणवर विजयी होऊन गेले; ज्याच्याने खचित्च मुसलमानांना मोठाच आनंद झाला. (तिर्मिझी, तफसीर सू.रुम) काही म्हणतात की, रोमनांना हा विजय तेव्हां मिळाला, जेव्हां, बद्रमध्ये मुसलमानांना, काफिरांवर विजय मिळाला; आणि मुसलमान आपल्या विजयावर आनंदित झाले. रोमनांचा हा विजय, कुरआन करीमच्या सत्य होण्याचे एक फार मोठे प्रमाण आहे. जवळच्या जमिनीने अभिप्रेत, अरबाच्या भूमी जवळचे इलाखे आहेत. म्हणजे सीरिया, पॅलेस्टाईन, वगैरे, जेथे खिस्त्यांची सत्ता होती.

२) म्हणजे हे मुहम्मद ! (ﷺ) आम्ही आपणांस ज्या बातम्या देत आहोत, की, लवकरच रोमन लोक, ईराणवर पुन्हा विजयी होतील. हे अल्लाहतआलाचे सत्य वचन आहे. जे ठराविक मुदतीत, खचित्च पूर्ण होऊन राहील.

३) म्हणजे बहुतेक लोकांना ऐहिक मामल्याचे फारच ज्ञान असते. म्हणून ते त्यांच्यात तर, आपली चलाखी आणि कौशल्याचे प्रदर्शन करीत असतात; ज्याचा फायदा, तात्कालिक आणि थोड्या दिवसांसाठी असतो. परंतु परलोकाच्या मामल्यापासून हे अजाण आहेत. ज्याचा नफा कायम आणि स्थिर आहे. म्हणजे ऐहिक कामांना फार चांगल्याप्रकारे ओळखतात, आणि धर्माकडून बिल्कुल बेखबर आहेत.

أَوَلَمْ يَتَفَكَّرُوا فِي أَنفُسِهِم ۗ مَّا خَلَقَ اللَّهُ السَّمَاوَاتِ
وَالْأَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا إِلَّا بِالْحَقِّ وَأَجَلٍ مُّسَمًّى ۗ وَ
إِنَّ كَثِيرًا مِّنَ النَّاسِ بِلِقَاءِ رَبِّهِمْ لَكَافِرُونَ ﴿٨﴾

**काय या लोकांनी आपल्या मनांत चिंतन केले नाही? की, अल्लाहतआलाने आकाशांना आणि पृथ्वीला, आणि यांच्या दर्म्यान जे काही आहे, सर्वांना उत्कृष्ट तऱ्हेने, [१] ठराविक मुदतीसाठी निर्माण केले आहे; होय! बहुतेक लोक खचित्च आपल्या पालनकर्त्याच्या भेटीला मानतच नाही. [२] (८)**

أَوَلَمْ يَسِيرُوا فِي الْأَرْضِ فَيَنظُرُوا كَيْفَ كَانَ
عَاقِبَةُ الَّذِينَ مِن قَبْلِهِمْ ۚ كَانُوا أَشَدَّ مِنْهُمْ قُوَّةً
وَأَثَارُوا الْأَرْضَ وَعَمَرُوهَا أَكْثَرَ مِمَّا عَمَرُوهَا وَ
جَاءَتْهُمْ رُسُلُهُم بِالْبَيِّنَاتِ ۖ فَمَا كَانَ اللَّهُ لِيَظْلِمَهُمْ
وَلَٰكِن كَانُوا أَنفُسَهُمْ يَظْلِمُونَ ﴿٩﴾

**काय, त्यांनी जमिनीत हिंडून फिरून, हे पाहिले, नाही [३] की, त्यांच्या पूर्वीच्या लोकांचा परिणाम कसा काय झाला? [४] ते यांच्यापेक्षां फार जास्त बलीष्ठ (आणि शक्तिवान) होते; [५] आणि त्यांनी पण जमीनी पेरल्या, नांगरल्या होत्या; आणि [६] यांच्यापेक्षां जास्त वसविल्या होत्या; आणि [७] त्यांच्याजवळ, त्यांचे पैगंबर, चमत्कार घेऊन आले होते; [८] हे तर अशक्य होते की, अल्लाहतआला त्यांच्यावर [९] जुलूम करतां, परंतु (खरे पांहू जाता) ते स्वत: आपल्या जीवांवर जुलूम करीत होते. [१०] (९)**

ثُمَّ كَانَ عَاقِبَةَ الَّذِينَ أَسَاءُوا السُّوأَىٰ أَن كَذَّبُوا
بِآيَاتِ اللَّهِ وَكَانُوا بِهَا يَسْتَهْزِئُونَ ﴿١٠﴾

**मग शेवटी वाईट करणाऱ्यांचा, फारच वाईट परिणाम झाला; [११] यासाठी की, ते अल्लाहतआलाच्या महावाक्यांना खोटे ठरवित होते, आणि त्यांची टर उडवित होते. (१०)**

१) किंवा एक उद्देश्य आणखी, सत्त्यासह निर्माण केले आहे, निरूद्देश्य आणि निरर्थक नाही. आणि तो उद्देश्य हा आहे की, सद्‌ाचरणी लोकांना त्यांच्या पुण्याचे फळ, आणि पाप्यांना त्यांच्या पापाची शिक्षा दिली जावी. म्हणजे काय ते आपल्या अस्तित्वावर मनन करीत नाही? की, कशाप्रकारे त्यांना नव्हत्याचे होते केले; आणि पाण्याच्या एका क्षुल्लक थेंबापासून त्याची निर्मिती केली. मग आकाश आणि पृथ्वीचा एका खास उद्देशाने, विस्तृत क्रम कायम केला. तसेच या सर्वांसाठी एक खास वेळ निश्चित केला, म्हणजे कयामतचा दिवस. ज्यादिवशी हे सर्व काही नष्ट होऊन जाईल. अर्थ हा आहे की, जर ते या गोष्टींवर विचार करते, तर खचित्च अल्लाहचे अस्तित्व, त्याचे पालकत्व, त्याचे उपास्यत्व, आणि त्याचे अचाट सामर्थ्य, यांची त्यांना जाणीव होऊन गेली असती; आणि ते ईमान घेऊन आले असते.

२) आणि याचे कारण तेच ब्रम्हांडामध्ये, चिंतन आणि मनन, न करणे आहे. नाहीतर कयामतला नाकारण्याचा योग्य आणि परिपूर्ण आधार नाहीच.

३) हे अवशेष आणि उजाडलेल्या वस्त्या, आणि धडा घेण्यासारख्या निशाण्यांवर, चिंतन व मनन, न करण्याबद्दल कान उघाडणी करण्यांत येत आहे. अर्थ आहे की, हिंडून, फिरून, त्यांनी प्रत्यक्ष पाहून घेतले आहे.

४) म्हणजे या काफिरांना, ज्यांना अल्लाहने, अल्लाहला नाकारणे, सत्त्याला नाकारणे आणि पैगंबरांना खोटे म्हणण्यामुळे नष्ट करून टाकले.

५) म्हणजे कुरैश आणि मक्कावाल्यांपेक्षा जास्त.

६) म्हणजे मक्केवालेतर शेतीवाडी पासून अपरिचितच आहे. परंतु मागील लोक या वैशिष्टांत पण, त्यांच्याहून अग्रेसर होते.

७) यासाठी की त्यांची वये पण जास्त होती. शारीरिक बळांत पण ते जास्त होते. अन्नसंपत्तीची साधने पण त्यांना जास्त प्राप्त होते. मग त्यांनी इमारती पण जास्त बनविल्या; शेती बाड्या पण केल्यां; आणि अन्नसंपत्ती पण भरपूर मिळवली.

८) परंतु त्यांनी त्यांच्यावर ईमान आणले नाही. परिणामत: सर्व कर्तृत्व, युक्त्या आणि आराम आणि सुसंपन्नता, असून सुद्धां, नष्ट होणे, त्यांच्या दैवी आले.

९) की त्यांना अपराधाशिवाय शिक्षेत ग्रस्त करून टाकतां.

१०) म्हणजे अल्लाहला नाकारून आणि पैगंबरांना खोटे ठरवून.

११) म्हणजे त्यांचा जो शेवट झाला, अत्यंत वाईट शेवट होता.

اَللّٰهُ يَبْدَؤُا الْخَلْقَ ثُمَّ يُعِيدُهٗ ثُمَّ اِلَيْهِ تُرْجَعُوْنَ ﴿١١﴾

**अल्लाहतआलाच सृष्टीची सुरवात करतो; मग तोच तिला दुसऱ्यादा निर्माण करील.[१] मग तुम्ही सर्व त्याच्याचकडे परतवून नेले जाल[२] ११**

وَيَوْمَ تَقُوْمُ السَّاعَةُ يُبْلِسُ الْمُجْرِمُوْنَ ﴿١٢﴾

**आणि ज्या दिवशी कयामत कायम होईल, त्या दिवशी पापी लोक आश्चर्यचकित होऊन जातील.[३] १२**

وَلَمْ يَكُنْ لَّهُمْ مِّنْ شُرَكَآئِهِمْ شُفَعٰٓؤُا وَكَانُوْا بِشُرَكَآئِهِمْ كٰفِرِيْنَ ﴿١٣﴾

**आणि त्यांच्या सर्व सरकतदारांमधून, एक पण त्यांचा शिफारशी होणार नाही.[४] आणि (स्वत: हे सुद्धांआपल्या) सरकतदारांचे नाकारणारे होऊन जातील[५] १३**

وَيَوْمَ تَقُوْمُ السَّاعَةُ يَوْمَئِذٍ يَّتَفَرَّقُوْنَ ﴿١٤﴾

**आणि ज्या दिवशी कयामत कायम होईल, त्या दिवशी, (समूह) वेगवेगळे होऊन जातील[६] १४**

فَاَمَّا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ فَهُمْ فِيْ رَوْضَةٍ يُّحْبَرُوْنَ ﴿١٥﴾

**ज्यांनी ईमान आणून चांगली कामे करीत राहिले ते तर स्वर्गांत आनंदीत करून दिले जातील[७] १५**

وَاَمَّا الَّذِيْنَ كَفَرُوْا وَكَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا وَلِقَآئِ الْاٰخِرَةِ فَاُولٰٓئِكَ فِي الْعَذَابِ مُحْضَرُوْنَ ﴿١٦﴾

**आणि ज्यांनी 'कुफ्र' केले होते, आणि आमच्या निशाण्यांना आणि परलोकाच्या भेटीला खोटे ठरवले होते, ते सर्व शिक्षेत ग्रस्त करून दिले जातील[८] १६**

فَسُبْحٰنَ اللّٰهِ حِيْنَ تُمْسُوْنَ وَحِيْنَ تُصْبِحُوْنَ ﴿١٧﴾

**तर अल्लाहचे पावित्र्य वर्णन करीत रहा; जेव्हा तुम्हास सांजवेल आणि तुम्ही सकाळ कराल १७**

१) म्हणजे ज्याप्रमाणे अल्लाहतआला, पहिल्यावेळी निर्माण करण्यांस समर्थ आहे; तो मेल्यानंतर दुसऱ्यांदा, त्यांना जिवंत करण्यावर सुद्धा समर्थ आहे. यासाठी की दुसऱ्यादा निर्माण करणे, पहिल्या वेळेपेक्षा जास्त कठीण नाही.

२) म्हणजे महेशरच्या मैदानांत, आणि हिशेबाच्या जेथे तो न्याय निवाड्याची व्यवस्था करेल.

३) इब्लास चा अर्थ आहे, आपल्या म्हणण्याच्या समर्थनांत, कोणी पुरावा सादर न करू शकणे. आणि हैराण आणि स्तब्ध उभे रहाणे. यालाच निराशेच्या भावार्थांत घेतात. या अनुषंगाने, मुबलिस तो असेल, जो निराश होऊन स्तब्ध उभा असेल, आणि त्याला काही प्रमाण सूचत नसेल. कयामतच्या दिवशी काफिर मुशरिकांची हीच स्थिती होईल. म्हणजे शिक्षा पाहून घेतल्यावर ते प्रत्येक गोष्टीकडून निराश, आणि प्रमाण आणि तर्क प्रस्तुत करण्याला असमर्थ असतील. मुजरीमून ने अभिप्रेत काफिर आणि मुशरिक आहेत; जसे की पुढील म्हावाक्यावरून स्पष्ट आहे.

४) सरकतदाराने अभिप्रेत ते निरर्थक उपास्य आहेत, ज्यांची मुशरिक लोक हे समजून उपासना करीत असत की, हे अल्लाहजवळ त्यांचे शिफारशी होतील; आणि त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वांचवून घेतील. परंतु अल्लाहने येथे स्पष्टीकरण करून दिले की, अल्लाहच्या बरोबर शिर्क करणाऱ्यांकरीतां, अल्लाहच्याजवळ कोणी शिफारशी असणार नाही.

५) म्हणजे तेथे त्यांच्या उपास्यत्वाचे नाकारणारे बनून जातील. कारण की, ते पाहून घेतील की, हे तर कोणाला काही फायदा पोहचविण्यास समर्थ नाहीत. (फत्हुल कदीर) आणि दुसरा अर्थ आहे की, हे उपास्य या गोष्टीचा इन्कार करून देतील की, हे लोक त्यांना अल्लाहचा सरकतदार ठरवून, त्यांची उपासना करीत होते; कारण की, ते तर यांच्या उपासनेकडून अजाण होते.

६) याच्याने अभिप्रेत एका व्यक्तीचे, दुसऱ्या व्यक्तीकडून वेगळे होणे नाही. किंबहुना अर्थ ईमानवाले आणि काफिर यांचे वेगवेगळे होणे हा आहे. ईमानवाले स्वर्गांत, आणि कुफ्र व शिर्कवाले नरकाग्नीत चालले जातील. आणि त्यांच्या दर्म्यान कायमचे वेगळे होणे, होऊन जाईल. हे दोघे पुन्हां कधी एकत्र होणार नाहीत. हे हिशेबानंतर होईल, तथापि या वेगळे होण्याचा खुलासा, पुढील वाक्यांत केला जात आहे.

७) म्हणजे त्यांना स्वर्गात, अल्लाहच्या कृपेने आणि इनामांनी, उपकृत केले जाईल; ज्याच्याने ते आणखी आनंदित होतील.

८) म्हणजे नेहमी अल्लाहच्या शिक्षेत जकडलेले राहतील.

وَلَهُ الْحَمْدُ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَعَشِيًّا وَّحِيْنَ تُظْهِرُوْنَ ﴿١٨﴾

**सर्व स्तुतीला योग्य, आकाश आणि पृथ्वीत, फक्त तोच आहे; तिसऱ्या प्रहरी, आणि जोहरच्या वेळी, सुद्धा (त्याचे पावित्र्य वर्णन करा.)[१] १८**

يُخْرِجُ الْحَيَّ مِنَ الْمَيِّتِ وَيُخْرِجُ الْمَيِّتَ مِنَ الْحَيِّ وَيُحْيِ الْاَرْضَ بَعْدَ مَوْتِهَا ۗ وَكَذٰلِكَ تُخْرَجُوْنَ ﴿١٩﴾

**(तोंच) जिवंतास मेलेल्यातून काढतो, आणि मेलेल्यास जिवंतातून काढतो.[२] आणि तोच जमिनीस तिच्या मृत झाल्या पश्चात्, जिवंत करतो. अशाच प्रकारे तुम्ही पण काढले जाणार[३] १९**

وَمِنْ اٰيٰتِهٖٓ اَنْ خَلَقَكُمْ مِّنْ تُرَابٍ ثُمَّ اِذَآ اَنْتُمْ بَشَرٌ تَنْتَشِرُوْنَ ﴿٢٠﴾

**अल्लाहच्या निशाण्यांतून एक, तुमची मातीतून निर्मिती आहे की, मग मनुष्य बनून चालू फिरूं लागतात[४] २०**

وَمِنْ اٰيٰتِهٖٓ اَنْ خَلَقَ لَكُمْ مِّنْ اَنْفُسِكُمْ اَزْوَاجًا لِّتَسْكُنُوْٓا اِلَيْهَا وَجَعَلَ بَيْنَكُمْ مَّوَدَّةً وَّرَحْمَةً ۗ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّقَوْمٍ يَّتَفَكَّرُوْنَ ﴿٢١﴾

**आणि त्याच्या निशाण्यांमधून, तुमच्याच जातीच्या पत्न्या निर्माण करणे आहे.[५] की तुम्ही, त्यांच्याकडून विश्रांती मिळवावी;[६] त्याने तुमच्या दर्म्यान, प्रीती आणि करूणा कायम केली;[७] खचित्च चिंतन आणि मनन करणाऱ्यांसाठी, याच्यांत बऱ्याचशा निशाण्या आहेत. २१**

१) ही अल्लाहतआलाकडून आपल्या पवित्र व्यक्तीत्वासाठी, पावित्र्य वर्णन, आणि स्तुती करणे आहे. ज्याचा उद्देश्य आपल्या सेवकांना मार्गदर्शन करणे आहे की, या वेळांत, ज्या एक दुसऱ्याच्या नंतर येतात, आणि ज्या याच्या असीम सामर्थ्याच्या आणि महानतेला प्रमाणित करतात. त्याचे पावित्र्य वर्णन, स्तुती करीत रहा, संध्याकाळची वेळा आणि उष:काल, ईशा, आणि जुहरच्या, वेळ तर तोच, तो पवित्र व्यक्तीत्व आहे, जो या सर्वांचे निर्माता आहे. आणि ज्याने या सर्व वेळांत, वेगवेगळे फायदे ठेवले आहेत. काही म्हणतात की, तस्बीहने अभिप्रेत नमाज आहे. आणि दोन्ही महावाक्यांतील चर्चीत वेळा, पांच नमाजीच्या वेळांआहेत, ''तुमसून'' मध्ये, मगरीब आणि ईशा, 'तुस्बिहून' मध्ये, फज्रची नमाज, 'अशीय्न' (तिसरा प्रहर) मध्ये 'असर', 'तुजहिरून' मध्ये, जुहरची नमाज येऊन जाते.( फत्हुल कदीर)

२) जसे अंड्याला कोंबडीपासून, कोंबडीला अंड्यापासून, मनुष्याला वीर्यबिंदूपासून, वीर्य बिंदुला मनुष्यापासून, आणि ईमानवाल्याला काफिरापासून, काफिराला, ईमानवाल्यापासून, निर्माण करीत असतो.

३) म्हणजे थडग्यातून जिवंत करून.

४) याच्याने उद्देश्य, त्या स्थित्यंतरा कडे इशारा आहे,ज्यांतून पसार होऊन, मूल, एक पूर्ण मनुष्य बनते. ज्याचा तपशिल कुरआनांत दुसऱ्या ठिकाणांवर केला गेला आहे. 'तन्तशिरून' ने अभिप्रेत, मनुष्याचे रोजी कमाविण्यासाठी, आणि दुसऱ्या मनुष्याला आवश्यक अशा गरजा भागविण्यासाठी, चालणे फिरणे आहे.

५) म्हणजे तुमच्याच प्रवर्गातून, स्त्रिया निर्माण केल्या. कारण की, त्यांनी तुमच्या पत्न्या बनावे. आणि तुम्ही जोडपे जोडपे होऊन जावे. 'जौज', अरबी मध्ये जोडप्याला म्हणतात. या अनुषंगाने, पुरूष स्त्रीकरीता, आणि स्त्री पुरूषाकरीता, 'जौज', आहे. स्त्रियांची जात, मानव होण्याचा अर्थ, आहे की, जगांतील पहिली स्त्री, ह.हव्वाला, ह.आदम عليه السلام. च्या डाव्या पांसळीपासून, निर्माण केले गेले; मग दोघांपासून मानव वंशाचा क्रम चालला.

६) अर्थ हा आहे की, जर पुरूष आणि स्त्रीची जात, एक दुसऱ्याहून भिन्न असती, उदाहणार्थ स्त्रीयां, जिन्न किंवा जनावरांमधून, असत्या, तर त्यांच्या पासून ते समाधान प्राप्त झाले नसते. जे यावेळी, दोघांचे एकाच प्रवर्गातील होण्याने प्राप्त होत आहेत. किंबहुना एक दुसऱ्यापासून तिरस्कार आणि भीती वाटली असती. ही अल्लाहतआलाच्या रहमतची कमाल आहे की त्याने मानवांच्या पत्न्या मानवच बनविल्या.

७) 'मवद्दत' हे आहे की, मर्द पत्नीशी अमर्याद प्रेम करतो व तसेच पत्नी, पतीशी. जसे की सर्वसाधारण पाहण्यांत येते. असे प्रेम, जे पती पत्नीत असते जगांत कोण्याही दोन व्यक्तीत नसते. आणि 'रहमत्' ही आहे की, पती, पत्नीला प्रत्येक प्रकारची सवलत आणि सुखसोयी पोहचवित असतो. ज्याचा जबाबदार, त्याला अल्लाहतआलाने बनविले आहे. आणि असेच स्त्रीला सुद्धां, आपले सामर्थ्य आणि अधिकाराच्या सीमेत (राहून) तथापि मनुष्याला, हे समाधान, आणि आपसांतील प्रेम, त्याच जोडप्यापासून प्राप्त होते, जे धर्मशास्त्राच्या कायद्याप्रमाणे आपसांत लग्नाने कायम होत असतात. आणि इस्लाम त्यांनाच दांपत्य (जोडपे) ठरविते. गैरकायदेशीर जोडप्यांना, तो जोडपेच मान्य करीत नाही; किंबहुना त्यांना व्याभिचारी आणि कुकृत्ये करणारे ठरवितो. आणि त्यांच्याकरीता कडक शिक्षा सुचवितो. आजकाल पाश्चिमात्य संस्कृतीचे शैतान, या अथक प्रयत्नांत व्यस्त आहेत की, पाश्चिमात्य समाजाप्रमाणे, इस्लामी देशात सुद्धा, लग्नाला अनावश्यक ठरवीत, व्याभिचारी पुरूष आणि स्त्रिया 'जोडपे' मान्य केले जावे. आणि त्यांच्या करीता शिक्षेच्या ऐवजी, ते हक्क मान्य करून घ्यावे, जे एका कायदेशीर जोडप्याला प्राप्त होत असतात. 'कातलहुमुल्लाह अन्ना युअफिकून'

وَمِنۡ اٰيٰتِهٖ خَلۡقُ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ وَاخۡتِلَافُ اَلۡسِنَتِكُمۡ وَاَلۡوَانِكُمۡ ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّلۡعٰلِمِيۡنَ ﴿۲۲﴾

**आणि त्याच्या (सामर्थ्याच्या) निशाण्यांमधून, आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, आणि तुमच्या भाषा आणि रंगाचे भिन्न भिन्न होणे, (१) पण आहे. समंजस आणि ज्ञानी लोकांसाठी, याच्यात, खचित्‌च मोठ्या निशाण्या आहेत** (२२)

وَمِنۡ اٰيٰتِهٖ مَنَامُكُمۡ بِالَّيۡلِ وَالنَّهَارِ وَابۡتِغَآؤُكُمۡ مِّنۡ فَضۡلِهٖ ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّقَوۡمٍ يَّسۡمَعُوۡنَ ﴿۲۳﴾

**आणखी (पण) त्याच्या (सामर्थ्याची) निशाणी, तुमच्या रात्री आणि दिवसाच्या झोपेत आहे; आणि त्याचे औदार्य (म्हणजे रोजीला) तुमचे शोधणे पण आहे. (२) ज्या लोकांना (लक्ष देऊन) ऐकण्याची सवय आहे, त्यांच्यासाठी याच्यामध्ये बऱ्याचशा निशाण्या आहेत.** (२३)

وَمِنۡ اٰيٰتِهٖ يُرِيۡكُمُ الۡبَرۡقَ خَوۡفًا وَّطَمَعًا وَّيُنَزِّلُ مِنَ السَّمَآءِ مَآءً فَيُحۡىٖ بِهِ الۡاَرۡضَ بَعۡدَ مَوۡتِهَا ؕ اِنَّ فِىۡ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّقَوۡمٍ يَّعۡقِلُوۡنَ ﴿۲۴﴾

**आणि त्याच्या निशाण्यामधून एक ही (पण) आहे, की तो तुम्हांस भिवविण्यांस आणि आशा दाखविण्यासाठी, विजा दाखवितो; (३) आणि आकाशातून पाऊस पाडतो, आणि याच्यापासून मृत जमिनीला जिवंत करून देतो; याच्यात (सुद्धां) बुद्धीवंतासाठी, पुष्कळशा निशाण्या आहेत** (२४)

وَمِنۡ اٰيٰتِهٖۤ اَنۡ تَقُوۡمَ السَّمَآءُ وَالۡاَرۡضُ بِاَمۡرِهٖ ؕ ثُمَّ اِذَا دَعَاكُمۡ دَعۡوَةً ‌ۖ مِّنَ الۡاَرۡضِ ‌ۖ اِذَاۤ اَنۡتُمۡ تَخۡرُجُوۡنَ ﴿۲۵﴾

**आणि त्याची एक निशाणी ही पण आहे की, आकाश आणि पृथ्वी त्याच्या हुकूमाने कायम आहेत. मग जेव्हा तो तुम्हास हांक मारील, फक्त एकाच वेळच्या हांकेबरोबरच, तुम्ही सर्व, जमिमनीतून निघून याल (४)** (२५)

وَلَهٗ مَنۡ فِى السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ ؕ كُلٌّ لَّهٗ قٰنِتُوۡنَ ﴿۲۶﴾

**आणि पृथ्वी व आकाशातील प्रत्येक वस्तूं त्याचीच आहे; आणि प्रत्येक त्याच्या आज्ञेच्या आधिन आहे. (५)** (२६)

१) जगामध्ये इतक्या भाषेचे निर्माण करून देणे, पण अल्लाहच्या सामर्थ्याची एक फार मोठी निशाणी आहे. अरबी आहे, तुर्की आहे, इंग्रजी आहे, उर्दू हिंदी आहे, पश्तु, पारसी, सिंधी, बलुची वगैरे आहेत. मग एक एक भाषेचे वेगवेगळे उच्चार आणि बोलण्याच्या पद्धती आहेत. एक मनुष्य हजारो आणि लाखोंच्या जमावांत आपल्या भाषा आणि उच्चाराने ओळखून घेतला जातो. फक्त भाषाच त्याचा संपूर्ण परिचय करून देते. अशाच प्रकारे एकच आई बाप (आदम आणि हव्वा) यांच्या पासून असून सुद्धा, रंग एका दुसऱ्यापासून वेगळे आहेत. कोणी काळा आहे, कोणी गोरा, कोणी सांवळा आहे की कोणी निळसर. मग काळ्या आणि गोऱ्या रंगात सुद्धां, इतके वर्ग करून ठेवले आहेत की, बहुतेक मानव वस्त्या, दोन रंगात विभागून सुद्धां, त्यांचे अनेक प्रकार आहेत. आणि एक दुसऱ्यापासून एकदम वेगळे आणि ठळक. मग त्यांच्या चेहऱ्याची ठेवण, शरीर बांधणी, व अंगकाठी, असा फरक ठेवून दिला आहे की, ऐकेका देशाचा मनुष्य, वेगवेगळा, ओळखून घेतला जातो. म्हणजे ही गोष्ट असून सुद्धांकी, एक मनुष्य, दुसऱ्या माणसासारखा नसतो, येथ पावेतो की, एक भाऊ, दुसऱ्या भावाहून वेगळा आहे. परंतु अल्लाहच्या सामर्थ्याची कमाल आहे की, तरी सुद्धा कोण्या एकाच देशाचे रहिवासी दुसऱ्या देशाच्या रहिवाश्यांपासून वेगळे असतात.

२) झोपेचे विश्रांती आणि आरामाला कारणीभूत होणे, मग ती रात्रीची असो अथवा वामकुक्षीची वेळ. आणि दिवसाला व्यापार आणि कारभारामार्फत, अल्लाहचे औदार्य शोधणे, हा विषय कित्येक ठिकाणी येऊन चुकला आहे.

३) म्हणजे आकाशांत वीजा चमकतात, आणि ढग गर्जना करतात, तेव्हा तुम्हास भीती पण वाटते की कोठे वीज कोसळण्याने किंवा अती वृष्टी होण्याने, शेत्या बर्बाद न होऊन जाव्यात; आणि आशा पण बाळगतात की, पाऊस पडेल, तर पिके चांगली येतील.

४) म्हणजे जेव्हां कयामत घडून येईल, तेव्हांआकाश आणि पृथ्वीची ही सारी व्यवस्था, जी यावेळी, त्याच्या हुकुमाने चालूंआहे; अस्ताव्यस्त होऊन जाईल. आणि सर्व माणसे थडग्यांतून जीवंत होऊन बाहेर निघून येतील.

५) आणि त्याच्या कधीही बदल न होणाऱ्या हुकुमापुढे सर्व बेबस आणि लाचार आहेत. जसे मृत्यूच आणि जीवन, आरोग्य आणि आजारपण, अपमान आणि सन्मान वगैरेमध्ये.

وَهُوَ الَّذِيْ يَبْدَؤُا الْخَلْقَ ثُمَّ يُعِيْدُهٗ وَهُوَ اَهْوَنُ عَلَيْهِ ۭ وَلَهُ الْمَثَلُ الْاَعْلٰى فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۚ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ؀

**आणि तोच आहे ज्याने सुरवातीला, सृष्टीला निर्माण केले; तोच पुन्हा दुसऱ्यादा निर्माण करील; आणि हे तर त्याच्यासाठी फारच सोपे आहे. त्याचीच उत्कृष्ट आणि थोर उपमा आहे, (१) आकाशात आणि पृथ्वीत सुद्धा, आणि तोच सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. (२७)**

ضَرَبَ لَكُمْ مَّثَلًا مِّنْ اَنْفُسِكُمْ ۭ هَلْ لَّكُمْ مِّنْ مَّا مَلَكَتْ اَيْمَانُكُمْ مِّنْ شُرَكَاۗءَ فِيْ مَا رَزَقْنٰكُمْ فَاَنْتُمْ فِيْهِ سَوَاۗءٌ تَخَافُوْنَهُمْ كَخِيْفَتِكُمْ اَنْفُسَكُمْ ۭ كَذٰلِكَ نُفَصِّلُ الْاٰيٰتِ لِقَوْمٍ يَّعْقِلُوْنَ ؀

**अल्लाहतआलाने तुमच्या करीता एक उदाहरण, खुद्द तुमच्यातूनच सांगितले, जे काही आम्ही तुम्हास देऊन ठेवले आहे, काय याच्यात तुमच्या दासांमधून पण, कोणी तुमचा पातीदार आहे? की, तुम्ही आणि तो, याच्यात बरोबर दर्जाचे आहात? (२) आणि तुम्ही त्यांची अशी भीती बाळगतात, जशी खुद्द आपल्यांची (३) आम्ही अक्कल बाळगणाऱ्यांकरीता, अशा प्रकारे स्पष्ट आणि उघड करून आमची महावाक्ये वर्णन करून देतो. (४) (२८)**

بَلِ اتَّبَعَ الَّذِيْنَ ظَلَمُوْٓا اَهْوَاۗءَهُمْ بِغَيْرِ عِلْمٍ ۚ فَمَنْ يَّهْدِيْ مَنْ اَضَلَّ اللّٰهُ ۭ وَمَا لَهُمْ مِّنْ نّٰصِرِيْنَ ؀

**खरी गोष्ट ही आहे की, हे जालीम लोक तर कुठल्याही ज्ञानाशिवाय, (५) आपल्या मनेच्छेवर चालत आहेत. त्याला कोण मार्ग दाखवील, ज्याला अल्लाहतआला, मार्गाहून हटवून देईल? (६) त्यांचा एक पण मददगार नाही (७) (२९)**

१) म्हणजे इतक्या कमाल आणि सामर्थ्यवान अल्लाह, तमाम उपमांहून उच्च आणि थोर आहे. ''लयसा कमिसलीही शय्उम'' (सू. शूरा-११) ''याच्यासारखी कोणतीही वस्तूं नाही.''

२) म्हणजे जेव्हां तुम्ही हे पसंत करीत नाही की, तुमचे गुलाम आणि नोकर चाकर, जी तुमच्याच सारखी माणसे आहेत, ती तुमच्या धन दौलतीत शामील, आणि तुमच्या समान होऊन जावीत; तर मग हे कशाप्रकारे होऊं शकते, की, अल्लाहचे सेवक, मग जरी ते देवदूत असोत, पैगंबर असोत, अवलीया आणि सदाचरणी लोक असोत, लाकूड व दगडाचे बनविलेले उपास्य, ते अल्लाहच्या बरोबर शामील होऊन जावेत, जेव्हां ते पण अल्लाहचे गुलाम आणि त्याची सृष्टी आहे ? म्हणजे ज्याप्रमाणे पहिली गोष्ट होऊं शकत नाही, दुसरी पण होऊ शकत नाही. म्हणून अल्लाहच्या बरोबर, दुसऱ्यांची पण उपासना करणे, त्यांना पण इच्छापूर्ती करणारे, संकट विमोचन समजणे, एकदम चूक आहे.

३) म्हणजे काय तुम्ही आपल्या गुलामांशी अशा प्रकारे भितात, ज्याप्रमाणे तुम्ही (स्वतंत्र लोक) आपसात एक दुसऱ्याला भितात; म्हणजे ज्याप्रकारे एकत्रित कारभार किंवा संपत्ती मध्ये, खर्च करतांना, भीती वाटते, की दुसरे भागीदार विचारपुस करतील. काय तुम्ही आपल्या गुलामांना अशा प्रकारे भितात ? म्हणजे भीत नाहीत. कारण की तुम्ही त्यांना धनदौलतीत पातीदार बनवून, आपल्या सारखेच पद देऊच शकत नाही. तर त्यांच्याशी भीती कसली?

४) कारण की ते आपल्या बुद्धीचा उपयोग करून, आणि चिंतन आणि मनन करून, अल्लाहकडून अवतरीत झालेल्या निशाण्या पासून फायदा उचलतात. आणि जे असे करीत नाहीत, त्यांच्या समजमध्ये, एकेश्वरवादाची गोष्ट पण येत नाही. जी बिल्कुल फारच स्पष्ट आहे.

५) म्हणजे या वास्तविकतेची त्यांना जाणच नाही, की, ते ज्ञानापासून वंचित् आणि अडाणीपणाला बळी पडलेले आहेत. आणि याच अज्ञान आणि बहकण्यामुळे, ते आपल्या बुद्धीला उपयोगांत आणण्याची क्षमता राखत नाहीत. आणि आपली मनोकामना आणि भ्रामक कल्पनेचे अनुकरण करणारे आहेत.

६) कारण की, अल्लाहकडून हिदायत त्याच्याच नशिबी असते, ज्याच्यांत हिदायतची (म्हणजे मिळविण्याची) इच्छा, आणि आकांक्षा असते, जे या खऱ्या तळमळीपासून वंचित् असतात, त्यांना आडमार्गी भटकण्यासाठी सोडून देण्यांत येते.

७) म्हणजे त्या बहकलेल्यांचा कोणी मददगार नाही; जो त्यांना हिदायत संपन्न करून देईन. किंवा त्यांच्यावरून शिक्षेला टाळून टाकेन.

فَأَقِمْ وَجْهَكَ لِلدِّينِ حَنِيفًا ۚ فِطْرَتَ اللَّهِ الَّتِي فَطَرَ النَّاسَ عَلَيْهَا ۚ لَا تَبْدِيلَ لِخَلْقِ اللَّهِ ۚ ذَٰلِكَ الدِّينُ الْقَيِّمُ وَلَٰكِنَّ أَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُونَ ﴿٣٠﴾

**तर आपण एकाग्र होऊन, आपले तोंड, धर्माकडे कायम राखा,** [१] **अल्लाहतआलाचा तो सृष्टी नियम, ज्यावर त्याने लोकांना निर्माण केले आहे;** [२] **अल्लाहच्या बनविण्यात फेरबदल होणार नाही.** [३] **हाच सरळ धर्म आहे.** [४] **परंतु बहुतेक लोक, जाणत नाहीत** [५] (३०)

مُنِيبِينَ إِلَيْهِ وَاتَّقُوهُ وَأَقِيمُوا الصَّلَاةَ وَلَا تَكُونُوا مِنَ الْمُشْرِكِينَ ﴿٣١﴾

**अल्लाहतआलाकडे वळून, त्याला भित रहा; आणि नमाजीला कायम करा. आणि मुशरिक बनून जाऊं नका.** [६] (३१)

مِنَ الَّذِينَ فَرَّقُوا دِينَهُمْ وَكَانُوا شِيَعًا ۖ كُلُّ حِزْبٍ بِمَا لَدَيْهِمْ فَرِحُونَ ﴿٣٢﴾

**त्या लोकांमधून ज्या लोकांनी आपल्या धर्माला तुकडे तुकडे करून टाकले, आणि स्वत: पण पंथ पंथ होऊन गेलेत;** [७] **प्रत्येक पंथ, या गोष्टीवर, जी त्याच्याजवळ आहे, त्याच्यावर खूष आहे.** [८] (३२)

وَإِذَا مَسَّ النَّاسَ ضُرٌّ دَعَوْا رَبَّهُمْ مُنِيبِينَ إِلَيْهِ ثُمَّ إِذَا أَذَاقَهُمْ مِنْهُ رَحْمَةً إِذَا فَرِيقٌ مِنْهُمْ بِرَبِّهِمْ يُشْرِكُونَ ﴿٣٣﴾

**आणि लोकांना जेव्हांकधी कोणी संकट पोहचते, तेव्हांआपल्या पालनकर्त्याकडे पूर्णपणे वळून, प्रार्थना करतात; मग तो जेव्हा त्यांना आपल्या रहमतची गोडी चाखवितो, तेव्हां त्यांच्यातून एक समूह, आपल्या पालनकर्त्याबरोबर शिर्क करूं लागतो.** (३३)

لِيَكْفُرُوا بِمَا آتَيْنَاهُمْ ۚ فَتَمَتَّعُوا فَسَوْفَ تَعْلَمُونَ ﴿٣٤﴾

**कारण की, त्याने त्या गोष्टीशी कृतघ्नता करावी, जी आम्ही त्यांना दिली आहे;** [९] **बरे! तर तुम्ही, फायदा उचलून घ्या; लवकरच तुम्हांस माहित होऊन जाईन** (३४)

१) म्हणजे अल्लाहच्या एक होण्यावर, आणि त्याच्या उपासनेवर कायम रहावे. आणि निरर्थक धर्मांकडे लक्षच देऊ नये.

२) 'फितरत' चा खरा अर्थ 'खिल्कत' म्हणजे निर्मितीचा आहे. येथे अभिप्रेत, इस्लामधर्म (अल्लाहचे एक होणे) आहे. भावार्थ हा आहे की, सर्वांची निर्मिती, मुस्लीम व काफिरचा फरक केल्याशिवाय- इस्लाम आणि तौहीदवर होत असतो. म्हणून तौहीद त्यांच्या नैसर्गिक स्वभावांत म्हणजे मूळ-प्रकृतीत, शामील आहे. जसे की अलस्तुच्या वचनाने स्पष्ट आहे. त्यानंतर पुष्कळांना, वातावरण आणि दुसऱ्यापुढे येणाऱ्या गोष्टी, नैसर्गिक प्रकृतीच्या या आवाजाकडे येऊं देत नाही, ज्यामुळे ते कुफ्रवरच बाकी राहतात. ज्याप्रमाणे नबी ﷺ ची हदीस आहे, ''प्रत्येक मूल नैसर्गिक प्रकृतीवर जन्माला येत असते, परंतु नंतर मग त्याचे आईबाप, याला यहूदी, खिस्ती आणि अग्नीपुजक, वगैरे बनवून देतात. (स.बुखारी)

३) म्हणजे अल्लाहच्या त्या निर्मितीत (फितरत) बदल करू नका. किंबहुना योग्य प्रशिक्षणामार्फत, त्याची जोपासना आणि संवर्धन करा की, ईमान आणि तौहिद मुलांच्या मेंदुत आणि अंत:करणात सामावून जावी.

४) म्हणजे तो धर्म, ज्याच्याकडे एकाग्र आणि लक्ष देण्याचा हुकूम आहे, किंवा जो नैसर्गिक प्रवृत्तीचा तगादा आहे, तोच खरा धर्म आहे.

५) म्हणूनच ते इस्लाम आणि तौहीदपासून अपरिचीत राहतात.

६) म्हणजे ईमान आणि ईशभय, आणि नमाजीच्या कायम करण्यापासून, पळ काढून, मुशरिक लोकांमधून होऊन जाऊं नका.

७) म्हणजे खऱ्या धर्माला सोडून, किंवा त्यांच्यात, मनासारखे फेरबदल करून, वेगवेगळ्या पंथात, विभागले गेले. जसे कोणी यहूदी, कोणी खिस्ती, कोणी अग्नीपुजक वगैरे होऊन गेलेत.

८) म्हणजे प्रत्येक पंथ आणि समूह समजतो की, तो सत्त्यावर आहे. आणि दुसरे असत्त्यावर. आणि जे आधार त्यांनी शोधून ठेवले आहे, त्यांना प्रमाणांसारखे गृहीत धरतात. त्यावर आनंदी आणि समाधानी आहेत. दुर्दैवाने मिल्लते इस्लामची पण हीच स्थिती झाली की, ती पण वेगवेगळ्या पंथात विभागली गेली आणि त्यांचा पण प्रत्येक पंथ, या असत्य श्रद्धेत व्यस्त आहे की, तो सत्त्यावर आहे. वास्तविक सत्त्यावर फक्त एकच समूह आहे, ज्याची ओळख, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी दाखवून दिली आहे की, माझ्या आणि माझ्या सहाबांच्या पद्धतीवर चालणारा असेल. आणि ही प्रतिष्ठा, अहले सुन्नत म्हणविल्या जाणाऱ्या मधून, फक्त, अहले हदीसला प्राप्त आहे. कस्सरल्लाहुंसवाद हूम्

९) हा तोच विषय आहे, जो सु. अन्कबूतच्या शेवटी येऊन चुकला.

أَمْ أَنزَلْنَا عَلَيْهِمْ سُلْطَٰنًا فَهُوَ يَتَكَلَّمُ بِمَا كَانُوا۟ بِهِۦ يُشْرِكُونَ ﴿٣٥﴾

**काय आम्ही त्यांच्यावर कोणी प्रमाण अवतरीत केले आहे, जे त्याला वर्णन करील, ज्याला हे अल्लाहच्या बरोबर सरकतदार करीत आहे.[१] ३५**

وَإِذَآ أَذَقْنَا ٱلنَّاسَ رَحْمَةً فَرِحُوا۟ بِهَا ۖ وَإِن تُصِبْهُمْ سَيِّئَةٌۢ بِمَا قَدَّمَتْ أَيْدِيهِمْ إِذَا هُمْ يَقْنَطُونَ ﴿٣٦﴾

**आणि जेव्हांआम्ही लोकांना आपल्या दयेची गोडी चाखवितो, तर ते फारच आनंदित होऊन जातात; आणि जर त्यांना, त्यांच्या हाताच्या कर्तृत्वामुळे, काही संकट पोहचते, तेव्हां एकदम ते निव्वळ निराश होऊन जातात[२] ३६**

أَوَلَمْ يَرَوْا۟ أَنَّ ٱللَّهَ يَبْسُطُ ٱلرِّزْقَ لِمَن يَشَآءُ وَيَقْدِرُ ۚ إِنَّ فِى ذَٰلِكَ لَءَايَٰتٍ لِّقَوْمٍ يُؤْمِنُونَ ﴿٣٧﴾

**काय त्यांनी हे पाहिले नाही की, अल्लाहतआला ज्याला इच्छितो त्याला वाढीव अन्नसंपत्ती देतो; आणि ज्याला इच्छितो त्याला काटकसरीने[३] (देतो.) याच्यांत सुद्धा त्या लोकांसाठी, ज्यांनी ईमान आणले आहे, (भरपूर) निशाण्या आहे. ३७**

فَـَٔاتِ ذَا ٱلْقُرْبَىٰ حَقَّهُۥ وَٱلْمِسْكِينَ وَٱبْنَ ٱلسَّبِيلِ ۚ ذَٰلِكَ خَيْرٌ لِّلَّذِينَ يُرِيدُونَ وَجْهَ ٱللَّهِ ۖ وَأُو۟لَٰٓئِكَ هُمُ ٱلْمُفْلِحُونَ ﴿٣٨﴾

**तर (आपण) नातेवाईकाला, गरीबाला, प्रवाशाला, प्रत्येकाला, त्याचा हक्क देऊन टाका; [४] हे त्याच्यासाठी उत्तम आहे, जे अल्लाहला भेटू इच्छीत असतील; [५] असेच लोक, मुक्ती मिळविणारे आहेत ३८**

१) हे व्यंग, नकारात्मक आहे. म्हणजे हे ज्यांना अल्लाहचा सरकतदार ठरवितात, आणि त्यांची उपासना करतात, हे कोठल्याही प्रमाणाशिवाय आहे. अल्लाहने त्याचे काही प्रमाण अवतरीत केलेले नाही. बरे! अल्लाहतआला, शिर्कला योग्य होण्याला आणि त्याला सिद्ध करण्याला, कशा प्रमाणे कोणी प्रमाण उताऱूंशकला असतां, जेव्हांकी, त्याने सर्व पैगंबर याचसाठी पाठविले होते की, त्यांनी शिर्कचे खंडन, आणि तौहीदला सिद्ध करावे. तथापि, प्रत्येक पैगंबराने येऊन, सर्वांत प्रथम, आपल्या लोकांना तौहीदचाच उपदेश केला. आणि आज तौहीदवाल्या मुसलमानांना सुद्धां, नुसत्या नांवाच्या मुसलमानांमध्ये तौहीद आणि सुन्नतचा उपदेश करावा लागत आहे. कारण की, मुसलमन जनतेची बहुतायता शिर्क आणि बिदअत मध्ये व्यस्त आहे.अल्लाहतआला त्यांना सरळ मार्ग दाखवो.

२) हा तोच विषय आहे, जो सू.हूद मध्ये येऊन गेला. आणि जो बहुसंख्य माणसांचा ढंग आहे की, सुखात ते शेखी मिरवूं लागतात; आणि संकटात ते निराश होऊन जातात. तथापि ईमानवाले याला अपवाद आहेत. जे त्रासांत सहनशिलता आणि सुखात अल्लाहचे आभार, म्हणजे सुकृत्ये करतात. अशाप्रकारे दोन्ही अवस्था त्यांच्या करीता, भलाई, प्रतिफळ, आणि मोबदल्याला कारणीभूत बनतात.

३) म्हणजे आपल्या बुद्धी आणि प्रयोजनानुसार, तो कोणाला धनदौलत जास्त, आणि कोणाला कमी देतो. येथपावेतो की, कधी कधी, अक्कल हुशारीमध्ये, आणि उघड साधन सामुग्रीमध्ये, दोन माणसे एक सारखीच वाटतात; एक सारखाच कारभार पण सुरू करता; परंतु एकाच्या कारभाराला फार उन्नती आणि उठाव मिळतो, आणि तो फार धनसंपन्न होऊन जातो; जेव्हा की दुसऱ्या माणसाचा कारभार मर्यादितच राहतो. आणि त्याच्या नशिबी संपन्नता येत नाही. शेवटी ती कोण व्यक्ती आहे? जिच्याजवळ सर्व अधिकार आहेत. आणि ती अशाप्रकारची ढवळाढवळ करीत असते. याशिवाय ती कधी, विपुल धनसंपत्तीच्या मालकाला गरीब, आणि गरीबला धनसंपत्ती बहाल करून टाकते. हे सर्व याच अल्लाहच्या हातांत आहे, ज्याचा कोणी सरकतदार नाही.

४) जेव्हा अन्नसंपत्तीची साधने, संपूर्ण पणे अल्लाहच्याच अखत्यांरात आहेत; आणि तो ज्यावर इच्छेल, त्याचे दरवाजे उघडून देतो, तर सुखसंपन्न लोकांना पाहिजे की, अल्लाहने दिलेल्या धनसंपत्तीतून, त्याचा तो हक्क अदा करावा, जो त्यांच्या संपत्तीतून त्याचे हक्कदार, नातेवाईक, गरीब आणि प्रवाशांचा ठेवला गेला आहे. नातेवाईकांच्या हक्काला यासाठी प्राधान्य दिले की, याचे श्रेष्ठत्व जास्त आहे. हदीसमध्ये येते की, गरीब नातेवाईकांबरोबर उपकार करणे, दुप्पट मोबदल्याला कारणीभूत आहे. एक दानधर्माचा बदला, दुसरा संबंध जोडण्याचा. याशिवाय त्याला हक्काने संबोधित करून याकडे पण इशारा करून दिला की, मदत करून त्यांच्यावर तुम्ही उपकार करणार नाहीत; किंबहुना एका हक्काचीच पुर्तता करणार आहोत.

५) म्हणजे स्वर्गांत, त्याच्या दर्शनाने, पुनीत होणे.

وَمَآ اٰتَيْتُمْ مِّنْ رِّبًا لِّيَرْبُوَاۡ فِيْٓ اَمْوَالِ النَّاسِ فَلَا يَرْبُوْا
عِنْدَ اللّٰهِ ۚ وَمَآ اٰتَيْتُمْ مِّنْ زَكٰوةٍ تُرِيْدُوْنَ وَجْهَ اللّٰهِ
فَاُولٰٓئِكَ هُمُ الْمُضْعِفُوْنَ ﴿٣٩﴾

तुम्ही जे व्याजावर देतात, की, लोकांची संपत्ती वाढत रहावी; ते अल्लाहतआलाच्या जवळ वाढत नाही; (१) आणि जो काही दानधर्म, जकात तुम्ही अल्लाहतआलाची मर्जी संपादण्यासाठी द्याल, तर असेच लोक, आपल्या (संपत्तीत) वाढ करणारे आहेत (२) ३९

اَللّٰهُ الَّذِيْ خَلَقَكُمْ ثُمَّ رَزَقَكُمْ ثُمَّ يُمِيْتُكُمْ ثُمَّ يُحْيِيْكُمْ ۭ
هَلْ مِنْ شُرَكَاۗىِٕكُمْ مَّنْ يَّفْعَلُ مِنْ ذٰلِكُمْ مِّنْ
شَيْءٍ ۭ سُبْحٰنَهٗ وَتَعٰلٰى عَمَّا يُشْرِكُوْنَ ﴿٤٠﴾

अल्लाहतआला तो आहे, ज्याने तुम्हांस निर्माण केले, नंतर तुम्हास अन्नसंपत्ती दिली; मग तुम्हांस मारून टाकेन, मग पुन्हां जिवंत करून टाकेन; सांगा! तुमच्या सरकतदारातून कोणी पण असा आहे, जो यांतून काही पण करूंशकेल? अल्लाहतआला करीतां पावित्र्य आणि श्रेष्ठत्व आहे, प्रत्येक त्या सरकतदारापासून, जे हे लोक निश्चित करतात. ४०

ظَهَرَ الْفَسَادُ فِي الْبَرِّ وَالْبَحْرِ بِمَا كَسَبَتْ اَيْدِي النَّاسِ
لِيُذِيْقَهُمْ بَعْضَ الَّذِيْ عَمِلُوْا لَعَلَّهُمْ يَرْجِعُوْنَ ﴿٤١﴾

खुष्कीत आणि जलांत, लोकांच्या कुकर्मांच्या कारणाने, फिसाद फैलावून गेला; यासाठी की, त्यांना, त्यांच्या काही कर्तृत्वाचे फळ, अल्लाहतआलाने चाखवून द्यावे; फार शक्य आहे की ते यापासून माघार घेतील (३) ४१

قُلْ سِيْرُوْا فِي الْاَرْضِ فَانْظُرُوْا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ
الَّذِيْنَ مِنْ قَبْلُ ۭ كَانَ اَكْثَرُهُمْ مُّشْرِكِيْنَ ﴿٤٢﴾

जमिनीत चालून फिरून पहा तर खरे, की पूर्वीच्या लोकांचा काय परिणाम झाला. ज्यांच्यातून बहुतेक लोक मुशरिक होते. (४) ४२

فَاَقِمْ وَجْهَكَ لِلدِّيْنِ الْقَيِّمِ مِنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِيَ يَوْمٌ
لَّا مَرَدَّ لَهٗ مِنَ اللّٰهِ يَوْمَىِٕذٍ يَّصَّدَّعُوْنَ ﴿٤٣﴾

तर आपण आपला रोख, या खऱ्या आणि सरळ धर्माकडेच ठेवा; यापूर्वी की, तो दिवस येऊन पोहचेल, ज्याचे टळू शकणे, अल्लाहतआलाकडूनच नाही; (५) त्या दिवशी सर्व वेगवेगळे (६) होऊन जातील. ४३

مَنْ كَفَرَ فَعَلَيْهِ كُفْرُهٗ ۚ وَمَنْ عَمِلَ صَالِحًا فَلِاَنْفُسِهِمْ
يَمْهَدُوْنَ ﴿٤٤﴾

कुफ्र करणाऱ्यांवर त्यांचे कुफ्र असेल, आणि सुकृत्ये करणारे आपलेच विश्रांतीस्थळ सजवीत आहेत (७) ४४

لِيَجْزِيَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ مِنْ فَضْلِهٖ ۭ
اِنَّهٗ لَا يُحِبُّ الْكٰفِرِيْنَ ﴿٤٥﴾

कारण की, अल्लाहतआलाने त्यांना आपल्या कृपेने पुण्यप्रतिफळ द्यावे. ज्यांनी ईमान आणले, आणि चांगली (८) कामे केलीत; तो काफिरांना मित्र ठेवीत नाही. ४५

وَمِنْ اٰيٰتِهٖٓ اَنْ يُّرْسِلَ الرِّيَاحَ مُبَشِّرٰتٍ وَّلِيُذِيْقَكُمْ
مِّنْ رَّحْمَتِهٖ وَلِتَجْرِيَ الْفُلْكُ بِاَمْرِهٖ وَلِتَبْتَغُوْا مِنْ
فَضْلِهٖ وَلَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿٤٦﴾

त्याच्या निशाण्यांमधून, खुषखबर देणाऱ्या (९) वाऱ्यांना चालविणे, हे पण आहे; यासाठी की तुम्हांस आपल्या दयेची गोडी चाखवावी; (१०) आणि यासाठी की त्याच्या हुकुमाने गलबते चालावीत (११) आणि यासाठी की त्याच्या औदार्याला (रोजीला) तुम्ही शोधावे; (१२) आणि यासाठी की, तुम्ही आभार मानावेत. (१३) ४६

१) म्हणजे व्याजाने, उघडतर, वाढ झालेली वाटते; परंतु वास्तविकतेत असे होत नाही. किंबहुना, त्याचा वाईट परिणाम, सरशेवटी, इहलोकांत आणि परलोकांत बर्बादीला कारणीभूत होतो. हजरत इब्ने अब्बास ﵁ आणि अनेक सहाबा आणि ताबईनने, या महावाक्यांत 'रिबा' ने अभिप्रेत व्याज नाही, किंबहुना तो नजराना आणि भेट घेतली आहे, जो कोणी गरीब मनुष्य, कोण्या श्रीमंताला, किंवा जनतेतील कोण्या माणसाने, बादशाह किंवा सत्ताधाऱ्याला, आणि एक सेवक आपल्या मालकाला, या नियतीने देतो की, तो याच्या बदल्यांत, मला याच्यापेक्षां जास्त देईल. याला व्याजाने याच्याचसाठी संबोधित केले आहे की, देते वेळी, याच्यांत वाढ होण्याची नियत असते. हे जरी योग्य (मबाह) असले, तथापि अल्लाहजवळ याचा मोबदला मिळणार नाही. ''फला यरबु इन्दल्लाहि'' ने याच परलोकांतील मोबदल्याला नाकारले आहे. यास्वरूपांत भाषांतर होईल, ''जी तुम्ही देणगी द्याल, या नियतीने की, परतीच्या स्वरूपांत जास्त मिळावे, तर अल्लाहच्या येथे याचे काही पुण्यफळ नाही.'' (इब्ने कसीर, अय्सरुत तफासीर)

२) जकात आणि दानधर्माने, एक तर आत्मिक नफ्यांत वाढ होणे; म्हणजे बाकी संपत्तीत, अल्लाहकडून बरकत टाकून दिली जाते. दुसरे कयामतच्या दिवशी, त्याचा मोबदला आणि प्रतिफळ, किती तरी पटीने मिळेल.

ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे, की, हलाल कमाईतून, एका खजुरी बरोबर दानधर्म, वाढून वाढून, अुहद डोंगराएवढा होऊन जाईल. (स.मुस्लिम)

३) खुष्कीने अभिप्रेत, मानवी वस्त्या, आणि 'तरी' ने अभिप्रेत समुद्र, सामुद्रिक मार्ग, आणि किनाऱ्यावरील वस्त्या आहेत. फिसाद ने अभिप्रेत, प्रत्येक तो बिघाड आहे ज्याच्याने समाज आणि वस्त्यांमध्ये, सुखशांती, आणि आरामांत व्यत्यय यावा. म्हणून याचा उपयोग, गुन्हे आणि पाप कर्मांवर सुद्धा योग्य आहे. की माणसे एक दुसऱ्यावर जुलुम करीत आहे. अल्लाहच्या बांधिव मर्यादांना पायाखाली तुडविणे, आणि चारित्र्याच्या सीमा रेषांना ओलांडत आहेत. आणि खून आणि रक्तपात सर्व साधारण होऊन गेला आहे. आणि या तात्कालिक आणि कायमस्वरूपी, संकटांवर सुद्धा, याचा उपयोग करणे बरोबर आहे. जी अल्लाहकडून शिक्षा किंवा तंबीह म्हणून अवतरीत होत असतात. जसे दुष्काळ, मोठ्या प्रमाणावर महामारी, भय आणि महापूर, वगैरे. अर्थ हा आहे की, जेव्हा मनुष्य अल्लाहच्या आज्ञाभंजनाला आपली सवयच बनवून घेईल, तेव्हांमग, कर्मांत बदल म्हणून, अल्लाहतआला कडून, माणसांच्या कर्मे कर्तृत्वाचा रोख, वाईट गोष्टीकडे फिरून जातो. आणि जमीन फिसादाने भरून जाते. सुख शांती संपून जाते, आणि त्यांच्या जागी भय आणि दहशत, लुटमार, खून आणि मारपीट, सर्व साधारण होऊन जाते. याच्या बरोबर बरोबर, काही वेळा, तात्कालीक आणि कायमस्वरूपी, संकटेपण अवतरीत होतात. उद्देश्य याच्याने हाच असतो की, या सर्व साधारण बिघाड, आणि संकटांना पाहून, कदाचित् लोक गुन्ह्यांपासून माघार घेतील. तौबा करतील, आणि त्यांचा रोख अल्लाहतआलाकडे होऊन जाईल.

याच्या उलट, जी समाज व्यवस्था, अल्लाहच्या आज्ञापालनावर कायम असेल आणि जेथे अल्लाहच्या मर्यादा (हदे) लागू असतील, जुलुमाच्या ऐवजी, न्यायाचे राज्य असेल, तेथे सुख व शांती, आणि अल्लाहकडून भलाई आणि बरकत अवतरीत होते. ज्याप्रमाणे एका हदीमध्ये, येते, ''मुलुखात अल्लाहच्या एका कायद्याला (हद्द) लागूं करणे, तेथील माणसांकरीतां, चाळीस दिवसांच्या पावसापेक्षा उत्तम आहे.'' (सुनन निसाई) अशाच प्रकारे ही हदीस आहे की, ''जेव्हा एक कुकृत्य करणारा माणूस (फाजीर) मरण पावतो तर सेवकांनाच त्याच्या पासून सुटका जाणवत नाही, तर शहरपण आणि वृक्षे आणि जनावरे सुद्धां सुटका मिळवितात'' (स.बुखारी)

४) शिर्कचा विशेष म्हणून उल्लेख केला; की, हा सर्वांत मोठा गुनाह आहे. याशिवाय, याच्यांत इतर अपराध व पाप पण येतात. कारण की याचे करणे सुद्धां, मनुष्य आपल्या मनेच्छेची ताबेदारी अंगिकारून करतो. याचसाठी काही लोक याला कार्मिक (अमली) शिर्क संबोधतात.

५) म्हणजे या दिवसाला येण्यापासून कोणी प्रतिबंध करूंशकत नाही. म्हणून या दिवसाच्या (कयामत) येण्याच्या पूर्वी पूर्वी, अल्लाहच्या आज्ञापालनाचा मार्ग स्वीकारून घ्यावा, आणि पुण्याचा सांठा करून ठेवावा.

६) म्हणजे दोन गटांत विभागले जातील, एक ईमानवाल्यांचा, दुसरा काफिरांचा

७) 'महद' चा अर्थ आहे, रस्ता सपाट करणे, जमिनीवर (काही) अंथरणे, म्हणजे या सुकृत्या द्वारा, स्वर्गांत जाणे, आणि तेथे उच्च दर्जे प्राप्त करण्यासाठी, मार्ग प्रशस्त करीत आहेत.

८) म्हणजे निव्वळ सुकृत्येच, स्वर्ग प्रवेशासाठी पुरेशी होणार नाहीत. जो पर्यंत यांच्या बरोबर अल्लाहची कृपा पण शामील न होईल. मग तो आपल्या कृपेने एका एका पुण्याचा मोबदला, दहा ते सातशेपटीपर्यंत, किंबहुना याच्यापेक्षांसुद्धां जास्त देईल.

९) म्हणजे हे वारे पावसाचे संदेश देणारे असतात.

१०) म्हणजे पावसाने मनुष्य पण आनंदित होतो, आणि पिके पण तरारून उठतात.

११) म्हणजे या वाऱ्यांनी नावा पण चालतात. अभिप्रेत वाऱ्यावर चालणारी गलबते आहेत. आतां मानवाने, अल्लाहने दिलेल्या बौद्धिक क्षमतेच्या भरपूर उपयोगाने, दुसऱ्या नावा आणि जहाज शोधून काढले आहेत; जे मशीनांमुळे चालतात. तथापि यांच्यासाठी सुद्धांअनुकूल हवामान आणि वारे आवश्यक आहेत. नाही तर अल्लाहतआला त्यांना पण तुफानी लाटांनी, पाण्यात बुडवून टाकण्यांत समर्थ आहे.

१२) म्हणजे यांच्यामार्फत निरनिराळ्या देशांत, ये, जा करून, व्यापार व कारभार करून.

१३) या उघड आणि गुप्त देणग्यांवर, ज्या अगणित आहेत; म्हणजे या सर्व सवलंती अल्लाहतआला तुम्हांस यासाठी पुरवित आहे की, तुम्ही आपल्या जीवनांत यापासून लाभ घ्यावा, आणि अल्लाहची उपासना, आणि आज्ञापालन पण करा.

وَلَقَدْ اَرْسَلْنَا مِنْ قَبْلِكَ رُسُلًا اِلٰى قَوْمِهِمْ فَجَآءُوْهُمْ بِالْبَيِّنٰتِ فَانْتَقَمْنَا مِنَ الَّذِيْنَ اَجْرَمُوْا ۭ وَكَانَ حَقًّا عَلَيْنَا نَصْرُ الْمُؤْمِنِيْنَ ﴿٤٧﴾

**आणि आम्ही तुमच्या पूर्वी सुद्धा, आपल्या पैगंबरांना, त्यांच्या लोकांकडे पाठविले; त्यांनी त्यांच्याजवळ प्रमाणे आणलीत; मग आम्ही गुन्हेगारांकडून, सूड घेतला; आमच्यावर ईमानवाल्यांची मदत (करणे) आवश्यक आहे.** [१] ﴿४७﴾

اَللّٰهُ الَّذِيْ يُرْسِلُ الرِّيٰحَ فَتُثِيْرُ سَحَابًا فَيَبْسُطُهٗ فِي السَّمَآءِ كَيْفَ يَشَآءُ وَيَجْعَلُهٗ كِسَفًا فَتَرَى الْوَدْقَ يَخْرُجُ مِنْ خِلٰلِهٖ ۚ فَاِذَآ اَصَابَ بِهٖ مَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖٓ اِذَا هُمْ يَسْتَبْشِرُوْنَ ﴿٤٨﴾

**अल्लाहतआला वारे वाहवतो, ते ढगांना उभारतात;** [२] **मग अल्लाहतआला आपल्या मंशेप्रमाणे, त्यांना आकाशांत पसरवून** [३] **देतो. आणि त्यांचे तुकडे तुकडे करून टाकतो;** [४] **मग तुम्ही पाहतां की, त्यांच्या मधून (पाण्याचे) थेंब निघतात** [५] **आणि ज्यांना अल्लाह इच्छितो त्या सेवकांवर तो पाणी वर्षवितो; तेव्हां ते आनंदित आनंदित होऊन जातात.** ﴿४८﴾

وَاِنْ كَانُوْا مِنْ قَبْلِ اَنْ يُّنَزَّلَ عَلَيْهِمْ مِّنْ قَبْلِهٖ لَمُبْلِسِيْنَ ﴿٤٩﴾

**आणि वास्तविक ते, पाऊस त्यांच्यावर पडण्यापूर्वी तर, निराश होऊन राहिले होते.** ﴿४९﴾

فَانْظُرْ اِلٰٓى اٰثٰرِ رَحْمَتِ اللّٰهِ كَيْفَ يُحْيِ الْاَرْضَ بَعْدَ مَوْتِهَا ۭ اِنَّ ذٰلِكَ لَمُحْيِ الْمَوْتٰى ۚ وَهُوَ عَلٰي كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿٥٠﴾

**तर तुम्ही, अल्लाहच्या दयेच्या चिन्हांकडे पहा, की, जमिनीच्या मृत झाल्या पश्चात, कशाप्रकारे अल्लाहतआला तिला जिवंत करून टाकतो ? काही संशय नाही की, तोच मृतांना जिवंत करणारा आहे;** [६] **आणि तो सर्व गोष्टींवर समर्थ आहे.** ﴿५०﴾

وَلَىِٕنْ اَرْسَلْنَا رِيْحًا فَرَاَوْهُ مُصْفَرًّا لَّظَلُّوْا مِنْ بَعْدِهٖ يَكْفُرُوْنَ ﴿٥١﴾

**आणि जर आम्ही जोराचा वारा चालवून देऊं; आणि हे लोक, आपल्या शेत्यांना (मुरझलेली) पिवळी पडलेली पाहून घेतील; तर मग याच्यानंतर अनुपकार करू लागतील** [७] ﴿५१﴾

१) म्हणजे हे मोहम्मद (ﷺ), ज्याप्रमाणे आम्ही आपणांस पैगंबर बनवून, आपल्या लोकांकडे पाठविले आहे; अशाचप्रकारे आपल्यापूर्वी सुद्धां, पैगंबर त्यांच्या लोकांकडे पाठविले. त्यांच्या बरोबर प्रमाणे, आणि चमत्कार पण होते. परंतु लोकांनी त्यांना खोटे ठरवले, त्यांच्यावर ईमान आणले नाही. सरशेवटी त्यांच्या या खोटे ठरवण्याच्या अपराधांत, आणि गुन्हे करण्यावर, आम्ही त्यांना आपल्या शिक्षेचा बळी करून दिले. आणि ईमानवाल्याची मदत आणि समर्थन केले, जे आमच्यावर आवश्यक आहे. हे जणू नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्या मुसलमानांचे सांत्वन आणि समाधान करण्यांत येत आहे; की, काफिर आणि मुशरिक लोकांच्या, खोटे ठरवण्याच्या रवैय्याने, घाबरण्याची आवश्यकता नाही. ही काही नवीन गोष्ट नाही. प्रत्येक पैगंबराबरोबर, त्याच्या लोकांनी असाच मामला केला आहे. तसेच काफिरांना तंबी आहे की, जर ते ईमान आणणार नाहीत, तर त्यांचा शेवटपण तोंच होईल, जो मागील लोकांचा होऊन चुकला आहे; ज्यांत पैगंबर आणि त्यांच्यावर ईमान आणणारे सर्व, शामील आहेत,

२) म्हणजे जे ढग कोठेही असतात, तेथून वारे त्यांना उचलून घेऊन जातात.

३) कधी चालवून, कधी थांबवून, कधी थरावर थर देऊन, कधी लांब पर्यंत. या आकाशांत, ढगांच्या वेगवेगळ्या अवस्था असतात.

४) म्हणजे यांना आकाशांत, पसरवून दिल्यानंतर, कधी त्यांना वेगवेळ्या तुकड्यांत विभागून टाकतो.

५) 'वद्‌क' चा अर्थ, पावसाचा आहे; म्हणजे या ढगांतून, जर अल्लाह इच्छितो तर पाऊस पडून जातो. ज्यामुळे पावसाचे इच्छुक आनंदित होऊन जातात.

६) रहमतच्या चिन्हाने अभिप्रेत, ते धन धान्य आणि फळफळावळ आहेत, जे पावसाने निर्माण होतात. आणि संपन्नता आणि संतोषाला कारणीभूत होतात. पहाण्याने अभिप्रेत, धडा घेण्याच्या दृष्टीने पाहणे आहे. कारण की मनुष्याने अल्लाहच्या सामर्थ्याला आणि या गोष्टीला मान्य करावे की, तो कयामतच्या दिवशी, अशाच प्रकारे मृतांना जिवंत करून टाकीन.

७) म्हणजे त्याच शेतांना, ज्यांना आम्ही पावसाने टवटवीत केले होते, जर कडक (उष्णता किंवा थंडी) वारे वाहवून, त्यांच्या हिरवेपणाला, पिवळसर पणांत बदलून देऊं; म्हणजे तयार पिकाला, बर्बाद करून टाकू, तर हेच पावसाने आनंदित होणारे, अल्लाहशी कृतघ्नता करू लागतील. अर्थ हा आहे की, अल्लाहला न मानणारे, सहनशिलता आणि धैर्याने पण वंचित् असतात. जराश्या आनंदाने फारच आनंदित होतात, आणि जराश्या संकटावर लगेच निराश, आणि दु:खी होऊन जातात. ईमानवाल्यांचा मामला दोन्ही स्थितीत यांच्यापेक्षा वेगळा असतो, जसा की, तपशील येऊन चुकला आहे.

فَاِنَّكَ لَا تُسۡمِعُ الۡمَوۡتٰى وَلَا تُسۡمِعُ الصُّمَّ الدُّعَآءَ اِذَا وَلَّوۡا مُدۡبِرِيۡنَ ﴿۵۲﴾

**नि:संशय तुम्ही मेलेल्यांना ऐकवूंशकत नाही; (१) आणि न बहिऱ्यांना आपला आवाज ऐकवूंशकतात. (२) जेव्हा की ते पाठ फिरवून, वळून गेले असतील. (३) ५२**

وَمَاۤ اَنۡتَ بِهٰدِ الۡعُمۡىِ عَنۡ ضَلٰلَتِهِمۡ‌ؕ اِنۡ تُسۡمِعُ اِلَّا مَنۡ يُّؤۡمِنُ بِاٰيٰتِنَا فَهُمۡ مُّسۡلِمُوۡنَ ﴿۵۳﴾

**आणि न आंधळ्यास तुम्ही, त्यांच्या बहकण्यापासून, हिदायत करणारे आहात. (४) आपण तर फक्त त्याच लोकांना ऐकवितात, जे आमच्या निशाण्यांवर विश्वास (५)(ईमान) ठेवतात; आणि जे आज्ञाधारक (६) पण आहेत ५३**

اَللّٰهُ الَّذِىۡ خَلَقَكُمۡ مِّنۡ ضُعۡفٍ ثُمَّ جَعَلَ مِنۡۢ بَعۡدِ ضُعۡفٍ قُوَّةً ثُمَّ جَعَلَ مِنۡۢ بَعۡدِ قُوَّةٍ ضُعۡفًا وَّشَيۡبَةً‌ ؕ يَخۡلُقُ مَا يَشَآءُ‌ ۚ وَهُوَ الۡعَلِيۡمُ الۡقَدِيۡرُ ﴿۵۴﴾

**अल्लाहतआला तो आहे, ज्याने तुम्हास दुर्बल अवस्थेत निर्माण केले; (७) मग या दुर्बलतेच्या नंतर कुवत दिली; (८) मग या कुवतीनंतर, दुर्बलता आणि वृद्धत्व करून टाकले. (९) तो जे इच्छितो ते निर्माण करतो. (१०) तो सर्वांशी पूर्ण वाकब, आणि सर्वांवर पूर्ण समर्थ आहे. ५४**

१) म्हणजे ज्याप्रमाणे मृत, अक्कल हुशारीने रिक्त असतात, अशाच प्रकारे हे आपल्या आवाहनाला समजण्याला, आणि त्याला मान्य करण्याला असमर्थ आहेत.

२) म्हणजे आपले प्रवचन आणि हितोपदेश त्यांच्याकरीतां काही परिणाम न करणारे आहेत; ज्याप्रमाणे कोण बहिरा असेल, त्याला तुम्ही आपली गोष्ट ऐकवूंशकत नाही.

३) हा यांच्या आक्षेप आणि नाकारण्याचा आणखी खुलासा आहे की, ते मृत आणि बहिरे होण्याबरोबरच, ते पाठ फिरवून जाणारे आहेत. सत्य गोष्ट त्यांच्या कानांत कशी काय पडूंशकते; आणि कां म्हणून त्यांच्या अंत:करणांत आणि बुद्धीत सामावूंशकते ?

४) यासाठी की, हे डोळ्यांनी खरोखर फायदा उचलण्यापासून, किंवा अंतर दृष्टीने वंचित् आहे. हे आडमार्गाच्या ज्या दलदलीत फसलेले आहेत, त्यांतून कशा प्रकारे निघावे ?

५) म्हणजे हेच ऐकून ईमान आणणारे आहेत; कारण की, हे चिंतन आणि मनन करणारे आहेत. आणि (अल्लाहच्या) सामर्थ्याच्या चिन्हांनी, खऱ्या परिणाम करणाऱ्याची ओळख प्राप्त करून घेतात.

६) म्हणजे सत्त्यापुढे नतमस्तक होणारे, आणि त्याचेच अनुकरण करणारे.

७) येथून अल्लाहतआला आपल्या सामर्थ्याची एक आणखी, कमाल वर्णन करीत आहे; आणि ती आहे वेगवेगळ्या ढंगाने, मनुष्याची निर्मिती. दुर्बलतेने अभिप्रेत, विर्यबिंदू म्हणजे पाण्याचा थेंब आहे. किंवा, बाल्यावस्था.

८) म्हणजे तारूण्य, ज्यांत बौद्धिक आणि शारीरिक शक्तीची पूर्णता होऊन जाते.

९) दुर्बलतेने अभिप्रेत, वार्धक्याचे वय आहे; ज्यांत, बौद्धिक आणि शारीरिक शक्तींचा ऱ्हास व्हावयास सुरवात होऊन जाते. आणि वृद्धत्वाने अभिप्रेत, पन्नाशी ते शेवटपर्यंतचा तो काळ आहे, ज्याच्यांत दुर्बलता वाढत जाते. हिम्मत कमी आणि हातपायांची हालचाल कमी होऊन जाते; आणि पकडण्याची क्षमता पण कमी होते. केस पांढरे, आणि सर्व उघड आणि अंदरूणी वैशिष्ट्ये, बदलून जातात. कुरआन ने, मनुष्याच्या चार मोठ्या अवस्था सांगितल्या आहेत. काही धर्म पंडितांनी, दुसऱ्या छोट्या छोट्या अवस्था पण हिशेबांत धरून, त्यांना तपशिलाने वर्णन केले आहे. जे कुरआनाच्या स्पष्ट करून सांगण्याच्या, वर्णन शैलीचे भाष्य आहे. उदाहरणार्थ इब्ने कसीर म्हणतात, मनुष्य, एका नंतर दुसऱ्या स्थिती आणि अवस्थांतून पसार होतो. त्याचे मूळ माती आहे. म्हणजे त्याचे वडील आदम (عليه السلام) ची निर्मिती, मातीपासून झाली होती. किंवा मनुष्य जे काही खातो, त्याच्याने ते वीर्य निर्माण होते, जे आईच्या गर्भाशयांत जाऊन, त्याचे अस्तित्व आणि निर्मितीला कारणीभूत बनते; ते सर्व मातीचीच उपज आहे. मग तो विर्यबिंदू, बिंदूपासून भृण, मग मासांचा गोळा, मग हाडे, ज्यांना मासांचा पोषाख चढविला जातो. मग याच्यांत प्राण फुंकला जातो. मग आईच्या पोटांतून या स्थितीत निघतो की, अती दुर्बल, आणि फारच नरम व नाजूक असतो. मग हळूंहळूं संगोपण मिळवून, बाल्यावस्था, वयांत येणे आणि तारूण्याला पोहचतो. आणि मग हळूंहळूं, परतीच्या उलट्या क्रमाची अंमलबजावणी सुरूं होते; वार्धक्य, वृद्धत्व, आणि मग अतीवृद्धत्व, येथ पावेतो की, मृत्यु त्याला आपल्या बाहुपाशांत घेऊन घेतो.

१०) याच गोष्टीत, दुर्बलता आणि शक्तीपण आहेत; ज्यातून मनुष्य पसार होतो. जसे की आतांच तपशील सांगण्यांत आला आहे.

وَيَوْمَ تَقُوْمُ السَّاعَةُ يُقْسِمُ الْمُجْرِمُوْنَ ۙ۬ مَا لَبِثُوْا غَيْرَ سَاعَةٍ ۭ كَذٰلِكَ كَانُوْا يُؤْفَكُوْنَ ﴿٥٥﴾

**आणि ज्या दिवशी कयामत [१] कायम होऊन जाईल, गुन्हेगार लोक शपथा खातील की, एका घटकेपेक्षां, (जगांत जास्त) राहिले नाहीत; [२] अशा तऱ्हेने हे बहकलेलेच राहिले. [३] ५५**

وَقَالَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْعِلْمَ وَالْاِيْمَانَ لَقَدْ لَبِثْتُمْ فِيْ كِتٰبِ اللّٰهِ اِلٰى يَوْمِ الْبَعْثِ ۡ فَهٰذَا يَوْمُ الْبَعْثِ وَلٰكِنَّكُمْ كُنْتُمْ لَا تَعْلَمُوْنَ ﴿٥٦﴾

**आणि ज्या लोकांना ज्ञान आणि ईमान दिले गेले, ते उत्तर देतील [४] की, तुम्ही तर जसे की, अल्लाहच्या पुस्तकांत [५] आहे, कयामतच्या दिवसापर्यंत थांबून राहिलात; [६] आजचा हा दिवस कयामतचाच दिवस आहे; परंतु तुम्ही तर याची खात्रीच बाळगत नव्हते. [७] ५६**

فَيَوْمَئِذٍ لَّا يَنْفَعُ الَّذِيْنَ ظَلَمُوْا مَعْذِرَتُهُمْ وَلَا هُمْ يُسْتَعْتَبُوْنَ ﴿٥٧﴾

**मग त्या दिवशी अन्यायी लोकांना, त्याची सबबी (बहाने) काहीही कामा येणार नाही. आणि, त्यांच्याकडून पश्चात्ताप व्यक्त करण्याची मागणी पण केली जाणार नाही. [८] ५७**

وَلَقَدْ ضَرَبْنَا لِلنَّاسِ فِيْ هٰذَا الْقُرْاٰنِ مِنْ كُلِّ مَثَلٍ ۭ وَلَئِنْ جِئْتَهُمْ بِاٰيَةٍ لَّيَقُوْلَنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْٓا اِنْ اَنْتُمْ اِلَّا مُبْطِلُوْنَ ﴿٥٨﴾

**नि:संशय आम्ही या कुरआनांत, लोकांच्या समोर, सर्व प्रकारचे दृष्टांत सांगून दिले आहेत. [९] आपण यांच्याजवळ कोणतीपण निशाणी घेऊन यावी, [१०] हे काफिर तर हेच म्हणतील की, तुम्ही (ठकबाज आणि) लबाड आहात [११] ५८**

كَذٰلِكَ يَطْبَعُ اللّٰهُ عَلٰى قُلُوْبِ الَّذِيْنَ لَا يَعْلَمُوْنَ ﴿٥٩﴾

**अल्लाहतआला त्या लोकांच्या अंत:करणावर, जे समज बाळगीत नाही, अशा तऱ्हेने मुहर करून देतो. ५९**

فَاصْبِرْ اِنَّ وَعْدَ اللّٰهِ حَقٌّ وَّلَا يَسْتَخِفَّنَّكَ الَّذِيْنَ لَا يُوْقِنُوْنَ ﴿٦٠﴾

**तर आपण सहन करा, [१२] खचित्च अल्लाहचे वचन सत्य आहे; आपणास त्या लोकांनी हलके (उतावळा) न करून [१३] टाकावे, जे विश्वास ठेवत नाहीत ६०**

१) 'साअत' चा अर्थ घटका, क्षण. अभिप्रेत कयामत आहे. याला साअत यासाठी म्हणण्यांत आले आहे की, हिचे घडणे, जेव्हांअल्लाह इच्छील, एका क्षणांत होऊन जाईन. किंवा यासाठी की, ही त्या क्षणांत होईल, जो जगाचा शेवटचा क्षण असेल.
२) जगांत किंवा थडग्यांमध्ये, हे आपल्या संवयीप्रमाणे खोट्या शपथा वाहतील. यासाठी की ते जगांत जितका काळ राहिले असतील, त्यांच्या जाणीवेतच असेल. आणि जर अभिप्रेत थडग्याचे जीवन आहे, तर त्यांची शपथ वहाणे, अज्ञानामुळे असेल; कारण की ते कबरीची मुद्दत जाणत नसतील. काही म्हणतात की, कयामतच्या कठीणतर आणि भयानक स्थितीच्या मुकाबल्यात, जगाचे जीवन त्यांना एका घटकेएवढे वाटेल.
३) 'अफकर्रजुलू' चा अर्थ आहे, सत्त्याहून फिरून गेला. अर्थ होईल, या फिरण्यासारखा, तो जगांत पण फिरत राहिला, किंवा बहकत राहिला.
४) ज्याप्रमाणे हे धर्मपंडित (अुल्मा) जगांत पण समजावित राहिले होते.
५) अल्लाहच्या पुस्तकाने अभिप्रेत, अल्लाहचे ज्ञान आणि त्याचा निर्णय आहे. म्हणजे 'लौहे महफुज'.
६) म्हणजे जन्मल्या दिवसापासून, कयामतच्या दिवसापर्यंत
७) की, ती येईल. किंबहुना उपहास आणि खोटे ठरवून, तुम्ही हीची मागणी करीत होता.
८) म्हणजे त्यांना जगांत, पाठवून ही संधी दिली जाणार नाही की, तेथे तौबा व आज्ञापालन करून, अल्लाहच्या प्रकोपाचे निर्सन करून घ्यावे.
९) ज्याच्याने अल्लाहची तौहीद सिद्ध आणि पैगंबरांची सत्यता, स्पष्ट होते. आणि अशाचप्रकारे शिर्कचे खंडन, आणि त्याचे निरर्थक होणे, ठळकपणे दिसते.
१०) ते कुरआन करीमने सादर केलेले कोणी प्रमाण असावे, किंवा त्यांच्या इच्छेनुसार कोणी चमत्कार वगैरे.
११) म्हणजे जादू वगैरेचे अनुकरण करणारे. अर्थ हा आहे की, मोठ्यांत मोठी निशाणी, स्पष्टाहून स्पष्ट प्रमाण, पण त्यांनी पाहून घेतले, तरीही कुठल्याही परिस्थितीत ते ईमान आणणार नीहत. का? याचे कारण पुढे सांगून देण्यात आले आहे की, अल्लाहने त्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून दिली आहे; जी या गोष्टीचे चिन्ह असते की त्यांचे कुफ्र आणि जुलूम, त्याच्या शेवटच्या मर्यादेपर्यंत पोहचून गेला आहे; ज्याच्यानंतर सत्त्याकडे परतण्याचे सर्व मार्ग, त्यांच्याकरीतां,बंद केलेले आहेत.
१२) म्हणजे त्यांचा विरोध आणि अहंकारावर, आणि त्यांच्या त्रासदायक गोष्टींवर; यासाठी की, अल्लाहने आपल्याला मदतीचे जे वचन दिले आहे, ते खचित्च सत्य आहे. तो कुठल्याही प्रकारे पूर्ण होणार आहे.
१३) म्हणजे आपल्याला क्रोधायमान करून, सहनशिलता आणि धैर्य सोडण्याला किंवा मुदाहिनत करण्याला भाग पाडू नये. किंबहुना आपण आपल्या जागी, दृढतेने जमून रहावे; आणि याच्यापासून तोंड फिरवू नये.

## (३१) सू. लुकमान

महावाक्ये ३४ — रुकूअ ४

ایاتها ٣٤ (٣١) سُوْرَةُ لُقْمٰنَ مَكِّيَّةٌ (٥٧) رکوعاتها ٤

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

الٓمّٓ ۚ ﴿١﴾
अलीफ-लाम-मीम[१] १

تِلْكَ اٰيٰتُ الْكِتٰبِ الْحَكِيْمِ ۙ ﴿٢﴾
हे बुद्धिमत्तावाल्या पुस्तकाची महावाक्ये आहेत २

هُدًى وَّ رَحْمَةً لِّلْمُحْسِنِيْنَ ۙ ﴿٣﴾
जी सुकृत्ये करणाऱ्यांसाठी,[२] मार्गदर्शक व निव्वळ दया आहेत ३

الَّذِيْنَ يُقِيْمُوْنَ الصَّلٰوةَ وَ يُؤْتُوْنَ الزَّكٰوةَ وَ هُمْ بِالْاٰخِرَةِ هُمْ يُوْقِنُوْنَ ؕ ﴿٤﴾
जे लोक (नियमित) नमाज पढतात, आणि जकात देतात, आणि परलोकाची पूर्ण खात्री बाळगतात.[३] ४

اُولٰٓئِكَ عَلٰى هُدًى مِّنْ رَّبِّهِمْ وَ اُولٰٓئِكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ﴿٥﴾
हेच लोक आहेत, जे आपल्या पालनकर्त्याकडून, हिदायतवर आहेत. आणि हेच लोक मुक्ती मिळविणारे आहेत.[४] ५

وَ مِنَ النَّاسِ مَنْ يَّشْتَرِيْ لَهْوَ الْحَدِيْثِ لِيُضِلَّ عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ بِغَيْرِ عِلْمٍ ۖۗ وَّ يَتَّخِذَهَا هُزُوًا ؕ اُولٰٓئِكَ لَهُمْ عَذَابٌ مُّهِيْنٌ ﴿٦﴾
आणि काही लोक असे पण आहेत, जे निरर्थक गोष्टींना अंगिकारतात,[५] की, काही समजल्या उमजल्या शिवाय, लोकांना अल्लाहच्या मार्गावरून बहकवावे. आणि याची (म्हणजे अल्लाहच्या महावाक्यांची) टर उडवावी;[६] हेच ते लोक आहेत, ज्यांच्या करतांअपमानकारक शिक्षा आहेत.[७] ६

وَ اِذَا تُتْلٰى عَلَيْهِ اٰيٰتُنَا وَلّٰى مُسْتَكْبِرًا كَاَنْ لَّمْ يَسْمَعْهَا كَاَنَّ فِيْٓ اُذُنَيْهِ وَقْرًا ۚ فَبَشِّرْهُ بِعَذَابٍ اَلِيْمٍ ﴿٧﴾
आणि जेव्हां त्याच्यासमोर आमची महावाक्ये वांचून ऐकविली जातात, तेव्हांअहंकार करतो, आणि अशा प्रकारे तोंड फिरवून घेतो, जणूं त्याने ऐकलेच नाही; जणूंकी त्याच्या दोन्ही कानांत, बधीरत्व[८] आहे; आपण त्याला दु:खदायक शिक्षेची खुषखबर ऐकवून द्या. ७

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَ عَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَهُمْ جَنّٰتُ النَّعِيْمِ ۙ ﴿٨﴾
नि:संशय, ज्या लोकांनी ईमान आणले, आणि सुन्नतप्रमाणे कामे पण केलीत, त्यांच्यासाठी देणग्यांवाले स्वर्ग आहेत. ८

خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ وَعْدَ اللّٰهِ حَقًّا ؕ وَ هُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٩﴾
जेथे ते नित्य निरंतर राहतील; अल्लाहचे सत्य वचन[९] आहे; तो फार मोठा समर्थ आणि पूर्ण बुद्धीमान आहे. ९

خَلَقَ السَّمٰوٰتِ بِغَيْرِ عَمَدٍ تَرَوْنَهَا وَ اَلْقٰى فِي الْاَرْضِ رَوَاسِيَ اَنْ تَمِيْدَ بِكُمْ وَ بَثَّ فِيْهَا مِنْ كُلِّ دَآبَّةٍ ؕ وَ اَنْزَلْنَا مِنَ السَّمَآءِ مَآءً فَاَنْۢبَتْنَا فِيْهَا مِنْ كُلِّ زَوْجٍ كَرِيْمٍ ﴿١٠﴾
त्यानेच आकाशांना खांबाविना, निर्माण केले आहे. तुम्ही त्यांना पाहात आहांत;[१०] आणि त्याने पृथ्वींत पर्वतांना टाकून दिले, यासाठी की, तिने तुम्हांस हलवून न शकावे;[११] आणि प्रत्येक प्रकारचे प्राणी जमिनीवर पसरून दिले आहेत.[१२] आणि आम्ही आकाशातून पाणी वर्षवून, मग आम्ही (त्याद्वारे) जमिनीत प्रत्येक प्रकारची उमदी जोडपी उगवून दिली.[१३] १०

१) यांच्या सुरवातीला सुद्धा, हे 'हुरूफे मुकत्तेआत' आहेत. त्यांचा अर्थ आणि त्यांच्याने अभिप्रेत चे ज्ञान फक्त अल्लाहतआलाच आहे. तथापि काही भाष्यकारांनी याचे दोन महत्त्वाचे फायदे सांगितले आहेत. एक हा की, हे कुरआन अशा प्रकारच्या हुरूफे मुकत्तआतने लिहिला गेला आहे. ज्याचे अशा प्रकारचे तालीफ चे उदाहरण सादर करण्याला अरब असमर्थ होऊन गेलेत. हे या गोष्टीचे प्रमाण आहे की, हे कुरआन अल्लाहचेच अवतरीत केलेले आहे. आणि ज्या पैगंबरावर हे अवतीर्ण झालेले आहेत, तो खरा पैगंबर आहे. जे धर्मशास्त्र तो घेऊन आला आहे, मनुष्य त्याचा मुहताज आहे. आणि त्याची सुधारणा आणि सद्भाग्याची परिपूर्णता याच धर्मशास्त्राने शक्य आहे. दुसरे असे की, मुशरिक लोक आपल्या साथीदारांना, या कुरआनाच्या ऐकण्यापासून मना करीत असत. की कदाचित् ते याच्याने परिणाम घेऊन, मुसलमान होऊन जातील. अल्लाहतआलाने वेगवेगळ्या अध्यायांची सुरवात या 'हुरूफे मुकत्तेआत' ने केली. कारण की, त्यांना याचे ऐकणे भाग पडावे; कारण की, ही वर्णन शैली नवी आणि पूर्वी कधीही न वापरलेली होती. (अयसरुत तफासीर) वल्लाह् अअ्लम!

२) 'मुहसिनीन' 'मुहसिन' चे अनेकवचन आहे. याचा एक अर्थ तर हा आहे, उपकार करणारा, आई वडीलांबरोबर, नातेवाईकांबरोबर, हक्कदारांबरोबर, गरजुंबरोबर. दुसरा अर्थ आहे, सत्कृत्ये करणारा; म्हणजे वाईट कृत्यांपासून बचाव करणारा, आणि सुकृत्ये करणारा. तिसरा अर्थ आहे, अल्लाहची उपासना फारच प्रांजळपणे, आणि व्याकुळता आणि नम्रतेने करणारा. ज्याप्रमाणे हदीसे जिब्रईल मध्ये आहे, कुरआन तसे तर सकल जगासाठी, हिदायत आणि दयेचे साधन आहे; परंतु याच्यापासून खरा फायदा कारण की, मुहसिनीन (सदाचरणी) आणि अल्लाहला भिणारेच उचलतात; म्हणून येथे, अशाप्रकारे सांगितले.

३) नमाज, जकात, आणि परलोकावर विश्वास, हे तिन्ही फारच महत्त्वाचे आहेत. म्हणून यांचा विशेष म्हणून उल्लेख केला. नाहीतर सदाचरणी, अल्लाहला भिणारे, सर्व फर्ज आणि सुन्नत, किंबहुना मुस्तहब गोष्टीपर्यंत, सर्वांवर अंमलबजावणी करतात.

४) फलाह (साफल्य) च्या भावार्थासाठी पहावे सू.बकर: आणि सू.मोमिनून ची सुरवात.

५) भाग्यवंत लोक, जे अल्लाहच्या पुस्तकाचे, सरळ मार्ग पत्करतात, आणि याच्याने ऐकण्याने लाभान्वयीत होतात; यांच्या उल्लेखानंतर, त्या दुर्दैवी लोकांबद्दल सांगण्यांत येत आहे की, ते अल्लाहच्या वाणीला ऐकण्याला तर टाळाटाळ करतात. तथापि साजसंगीत, गायन वादन आणि गाणे फार आवडीने ऐकतात. आणि फारच रस घेतात. खरीदण्याने अभिप्रेत हेच आहेत की, आपल्या आवडीची, आनंदित करणारी साधने घरात आणतात; आणि मग त्यांच्या पासून मजा घेतात. 'लहुवल हदीस' ने अभिप्रेत गाणे बजावणे, त्याचा साज सामान, यंत्रे, संगीत, आणि प्रत्येक ती वस्तू जी माणसाला भलाई आणि नेहमीच्या कर्मांपासून गाफील करून देईल, याच्यात किस्से कहाण्या, गोष्टी नाटके; कादंबऱ्या आणि लैंगिक, आणि सनसनाटी निर्माण करणारे साहित्य, मासिके निर्लज्जपणाचा प्रचार करणारी वर्तमान पत्रे, हे सर्वच येऊनच जातात. आणि अत्याधुनिक शोध, रेडिओ, टिव्ही., व्हि.सी.आर., व्ही.डी.ओ.फिल्मस्, वगैरे सुद्धापण. पैगंबरीच्या काळांत, काही लोकांनी गाण्या बजावणाऱ्या दास्यासुद्धां, याच उद्देशाने खरीदल्या होत्या की, त्यांनी लोकांची मने, गाणी ऐकवून रिझवीत रहावीत; कारण की, त्यांनी कुरआन आणि इस्लामपासून दूर रहावे. या अनुषंगाने याच्यांत अतिशयोक्ती पण येऊन जाते; जी आजकाल, कलाकार, फिल्मी तारे, सांस्कृतिक कार्यक्रम करणारे, आणि ठाऊक नाही कसे कसे पंथ, सुंदर दिसणारे आणि मनाला आकर्षित करणाऱ्या नांवानी संबोधित केली जातात.

६) या सर्व गोष्टींपासून मनुष्ये खचित्च अल्लाहच्या मार्गाहून भटकून जातात. आणि धर्माला उपहास आणि थट्टेचे लक्ष्य पण बनवितात.

७) यांचा पक्ष घेणारे, त्यांना प्रोत्साहीत करणारे, राज्याचे पदाधिकारी, संस्था, वर्तमान पत्रांचे मालक, लेखक, स्तंभलेखक, पण या दु:खदायक शिक्षेला पात्र ठरतील. अआजनल्लाह् मिनहु!

८) ही त्या मनुष्याची स्थिती आहे, जो चर्चित, खेळ तमाशांच्या गोष्टीत मग्न रहातो. जो कुरआनाची महावाक्ये आणि अल्लाह व रसूलच्या गोष्टी ऐकून बहिरा बनून जातो. वास्तविक तो बहिरा नसतो. आणि अशा प्रकारे तोंड फिरवून घेतो, जणू त्याने ऐकलेच नाही. कारण की याच्या ऐकण्याने त्याला त्रास वाटतो. म्हणून यामुळे, याचा काही फायदा होत नाही. 'वकरन्' चा अर्थ कानांत असे काही बधीरत्व, जे त्याला ऐकण्यापासून वंचित् करून देईल.

९) म्हणजे हे खचित्च पूर्ण होईल. यासाठी की, हे अल्लाहकडून आहे. 'वल्लाहु ला युखलिफुल मिआद' (सू.रअद-३१)

१०) 'तरवूनहा' जर 'अमदून' ची 'सिफत्' असेल तर भाषांतर होईल, अशा खांबाशिवाय, ज्यांना तुम्ही पांहू शकाल. म्हणजे आकाशाला खांब आहेत, परंतु असे की, ज्यांना तुम्ही पांहू शकत नाही.

११) 'रवासिया' 'रासियतून' चे अनेकवचन आहे, अर्थ 'साबितता' चा आहे. म्हणजे पर्वतांना जमिनीवर अशा प्रकारे, जड वजन बनवून ठेवून दिले आहे. की, ज्यामुळे जमीन स्थीर रहावी म्हणजे हलूं नये. याचसाठी पुढे सांगितले की, जमीन तुमच्यासह इकडे तिकडे डोलूं नये, ज्याप्रमाणे किनाऱ्यावर उभ्या असलेल्या सागरी जहाजांत मोठे मोठे नांगर टाकून देण्यात येतात; यासाठी की जहाज डोलूं नये. जमिनीसाठी पर्वतांची पण हीच स्थिती आहे.

१२) म्हणजे नाना प्रकारचे प्राणी, जमिनीत सर्वत्र पसरवून दिले; ज्यांना माणूस खातो पण, स्वारी आणि ओझी वहाण्यासाठी पण उपयोगांत आणतो आणि शोभा आणि भूषण म्हणून पण आपल्याजवळ बाळगतो.

१३) 'जवज्' येथे प्रकारांच्या अर्थांत आहे. म्हणजे सर्व प्रकारची धनधान्ये आणि फळफळावळ निर्माण केलेत. त्यांचे चांगले असणे, त्यांचे लज्जतदार होणे आणि भरपूर नफा देण्याकडे इशारा करते.

هٰذَا خَلْقُ اللّٰهِ فَاَرُوْنِيْ مَاذَا خَلَقَ الَّذِيْنَ مِنْ دُوْنِهٖ ؕ بَلِ الظّٰلِمُوْنَ فِيْ ضَلٰلٍ مُّبِيْنٍ ۟﴿١١﴾

**ही आहे अल्लाहची सृष्टी! (१) आता तुम्ही मला, याच्याशिवाय, दुसऱ्या कोणाची काही, सृष्टी तर दाखवां!!, (२) (काही नाही!!!) किंबहुना हे जालीम तर धडधडीत चुकीत पडलेले आहेत ⑪**

وَلَقَدْ اٰتَيْنَا لُقْمٰنَ الْحِكْمَةَ اَنِ اشْكُرْ لِلّٰهِ ؕ وَمَنْ يَّشْكُرْ فَاِنَّمَا يَشْكُرُ لِنَفْسِهٖ ۚ وَمَنْ كَفَرَ فَاِنَّ اللّٰهَ غَنِيٌّ حَمِيْدٌ ۟﴿١٢﴾

**आणि आम्ही खचित्‌च लुकमानाला शहाणपण (३) दिले होते की, तूंअल्लाहचे आभार मान; (४) प्रत्येक आभार मानणारा, आपल्याच फायद्यासाठी, आभार मानतो; जो पण कृतघ्नता करेल, त्याने जाणून घ्यावे की, अल्लाहतआला निरपेक्ष, आणि सुस्तुत्य आहे. ⑫**

وَاِذْ قَالَ لُقْمٰنُ لِابْنِهٖ وَهُوَ يَعِظُهٗ يٰبُنَيَّ لَا تُشْرِكْ بِاللّٰهِ ؕ اِنَّ الشِّرْكَ لَظُلْمٌ عَظِيْمٌ ۟﴿١٣﴾

**आणि जेव्हा लुकमानने उपदेश करत असतांना आपल्या मुलाला सांगितले की, हे माझ्या प्रिय मुला ! अल्लाहच्या बरोबर सरकतदार ठरवू नकोस. (५) नि:संशय 'शिर्क' फार मोठा अत्याचार आहे. (६) ⑬**

وَوَصَّيْنَا الْاِنْسَانَ بِوَالِدَيْهِ ۚ حَمَلَتْهُ اُمُّهٗ وَهْنًا عَلٰى وَهْنٍ وَّفِصٰلُهٗ فِيْ عَامَيْنِ اَنِ اشْكُرْ لِيْ وَلِوَالِدَيْكَ ؕ اِلَيَّ الْمَصِيْرُ ۟﴿١٤﴾

**आणि आम्ही मनुष्याला, त्याच्या आईबापासंबंधी, उपदेश केला आहे; (७) त्याच्या आईने झटक्यावर झटके सोसून, (८) त्याला पोटांत ठेवले. आणि त्याचे दूध सोडणे तर दोन वर्षांत आहे (९) की माझे आणि आपल्या आई बापांचे उपकार मान. मजकडेच परतून येणे आहे. ⑭**

१) 'हाजा' (हा) इशारा आहे, अल्लाहच्या त्या निर्माण केलेल्या वस्तुंकडे, ज्यांचा मागील महावाक्यांत उल्लेख आला.
२) म्हणजे तुम्ही ज्यांची उपासना करतात, आणि त्यांना मदतीसाठी बोलावितात, त्यांनी आकाश आणि पृथ्वीत कोणती वस्तूं निर्माण केली आहे? कोणी एक वस्तुतर दाखवा? उद्देश्य हा आहे की, जेव्हां प्रत्येक वस्तुचा निर्माता फक्त आणि फक्त अल्लाहच आहे, तर उपासनेचा हक्कदार पण फक्त तोच आहे. याच्या शिवाय ब्रम्हांडात कोणी अस्तित्व असे नाही की ज्याची उपासना केली जावी; आणि त्याला मदतीसाठी बोलाविले जावे.
३) ह.लुकमान (عليه السلام) अल्लाहचे सदाचरणी सेवक होते. ज्यांना अल्लाहने शहाणपण म्हणजे बुद्धी आणि समज, आणि धार्मिक अंतर्दृष्टी मध्ये ठळक स्थान बहाल केले होते. यांना कोणी विचारले, तुम्हास ही समज उमज कशाप्रकारे प्राप्त झाली? त्यांनी सांगितले, योग्य तेच बोलणे, सत्याला अंगिकारणे आणि निरर्थक गोष्टींपासून स्वत:चा बचाव करणे, आणि गुपचूप बसण्यामुळे. याची शहाणपणा आणि अक्कल हुशारीवर आधारित, एक घटना पण सुप्रसिद्ध आहे की, हे गुलाम होते. त्यांच्या धन्याने सांगितले की, बकरी जबाह करून, तिचे सर्वांत उत्तम दोन भाग घेऊन ये; म्हणून ते जीभ आणि हृदय काढून घेऊन गेलेत. एका दुसऱ्या प्रसंगी धन्याने त्यांना सांगितले की, बकरी जबाह करून तिचे सर्वात खराब दोन भाग घेऊन ये. ते पुन्हा तेच हृदय आणि जीभ घेऊन गेलेत. विचारल्यावर त्यांनी सांगितले की, जीभ आणि हृदय जर बरोबर असेल, तर हे सर्वांत उत्तम आहे. आणि जे हे बिघडून जातील, तर यांच्या पेक्षां वाईट कोणतीही गोष्ट नाही. (इब्ने कसीर)
४) आभार मानण्याचा अर्थ, त्याच्या देणग्यांवर त्याची स्तुती करणे आणि त्याच्या हुकुमांचे आज्ञापालन करणे.
५) अल्लाहतआलाने, ह. लुकमान عليه السلام ची सर्वांत प्रथम ही इच्छा नोंदविली की, त्यांनी आपल्या पुत्राला 'शिर्क' पासून मना कले. ज्याने हे स्पष्ट झाले की, आईबापांसाठी हे आवश्यक आहे की, त्यांनी आपल्या संततीला शिर्कपासून वांचविण्यासाठी सर्वांत जास्त प्रयत्न करावा.
६) हे काहींच्या जवळ, ह.लुकमान عليه السلام चेच म्हणणे आहे. आणि काहींनी याला अल्लाहचे म्हणणे ठरविले आहे. याच्या समर्थनांत ती हदीस सादर केली आहे, जी अल्‌लजिना आमनु व लम् यल्‌बिसु ईमानहुम् बि जुल्मीन'' च्या अवतीर्ण होण्याच्या बाबतीत आहे. जिच्यांत आपण (सल्ल.) नी फर्माविले होते की, येथे जुलूमाने अभिप्रेत, मोठा जुलूम आहे. आणि आयत ''इन्नश् शिर्क लजुल्मुन अजीम'' चा हवाला दिला. (स.बुखारी, क्र.४७७६) परंतु याच्याने अल्लाहचे म्हणणे असल्याबद्दल न समर्थन होते आणि न खंडन.
७) 'तौहीद (एकेश्वरवाद) आणि अल्लाहच्या उपासनेबरोबरच, आईवडीलांबरोबर, चांगल्या वर्तणुकीच्या ताकीदने या गोष्टीचे महत्त्व स्पष्ट होते.
८) याचा अर्थ आहे की, आईच्या गर्भाशयांत, मूल ज्या हिशेबाने वाढत जाते, आईवर ओझे वाढत जाते; ज्यामुळे स्त्री दुर्बलाहून दुर्बल, होत चालली जाते. आईच्या या श्रमाच्या उल्लेखाने, याकडे पण इशारा वाटतो की आईबापांबरोबर चांगली वागणूक करते वेळी, आईला प्राधान्य दिले जावे. जसे की, हदीसमध्ये सुद्धांआहे.
९) याच्याने ठाऊक झाले की, दूध पाजण्याची मुदत दोन वर्षे आहे. यापेक्षांजास्त नाही.

وَإِنْ جَاهَدَاكَ عَلَىٰٓ أَنْ تُشْرِكَ بِي مَا لَيْسَ لَكَ بِهِۦ عِلْمٌ فَلَا تُطِعْهُمَا ۖ وَصَاحِبْهُمَا فِي الدُّنْيَا مَعْرُوفًا ۖ وَاتَّبِعْ سَبِيلَ مَنْ أَنَابَ إِلَيَّ ۚ ثُمَّ إِلَيَّ مَرْجِعُكُمْ فَأُنَبِّئُكُم بِمَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿١٥﴾

**आणि जर ते तुझ्यावर या गोष्टीसाठी, दबाव आणतील, की तू माझ्याबरोबर (कोणाला) शामील करावे; ज्याचे तुला काही ज्ञान नसावे. तर त्यांचे म्हणणे मानूं नकोस, पण, होय! जगांत त्यांच्याबरोबर, चांगल्या रीतीने रहा. आणि त्याच्या मार्गावर चाल, जो माझ्याकडे झुकलेला आहे. [१] तुम्हां सर्वांस माझ्याचकडे परतून येणे आहे; तुम्ही जे काही करीत आहांत; ते तुम्हांस मी विदीत करून देईन [२] (१५)**

يَٰبُنَيَّ إِنَّهَآ إِن تَكُ مِثْقَالَ حَبَّةٍ مِّنْ خَرْدَلٍ فَتَكُن فِي صَخْرَةٍ أَوْ فِي السَّمَٰوَٰتِ أَوْ فِي الْأَرْضِ يَأْتِ بِهَا اللَّهُ ۚ إِنَّ اللَّهَ لَطِيفٌ خَبِيرٌ ﴿١٦﴾

**प्रिय मुला! जर कोणी वस्तूं राईच्या दाण्याबरोबर असेल, [३] मग जरी ती कोण्या दगडाखाली असेल, किंवा आकाशांत असेल, किंवा जमिनीत असेल, त्याला अल्लाहतआला अवश्य आणून हजर करील. अल्लाहतआला मोठाच सुक्ष्मदर्शी आणि चतूर आहे. (१६)**

يَٰبُنَيَّ أَقِمِ الصَّلَوٰةَ وَأْمُرْ بِالْمَعْرُوفِ وَانْهَ عَنِ الْمُنكَرِ وَاصْبِرْ عَلَىٰ مَآ أَصَابَكَ ۖ إِنَّ ذَٰلِكَ مِنْ عَزْمِ الْأُمُورِ ﴿١٧﴾

**हे माझ्या मुला! तू नमाज पढीत रहा; चांगल्या कामांचा उपदेश करीत रहा; वाईट कामांपासून मना करीत रहा. आणि जे संकट तुझ्यावर येईल, ते सहन कर. [४] (विश्वास ठेव) की ही मोठ्या हिंमतीचे कामे आहेत [५] (१७)**

१) म्हणजे ईमानवाल्यांचा मार्ग.

२) म्हणजे माझ्याकडे वळणाऱ्या (इमानवाल्यांचे) चे अनुकरण, यासाठी करा की, सरशेवटी, तुम्हांसर्वांस माझ्याच दरबारांत यावयाचे आहे; आणि माझ्याचकडून प्रत्येकाला त्याच्या (चांगल्या किंवा वाईट) कर्मांचा मोबदला मिळणार आहे. जर तुम्ही माझ्या मार्गांचे अनुकरण कराल, आणि माझे स्मरण करीत, जीवन घालवाल, तर आशा आहे की कयामतच्या दिवशी, माझ्या न्यायालयांत विजयी व्हाल; नाही तर दुसऱ्या स्थितीत, माझ्या शिक्षेत पकडले जाल. बोलण्याचा क्रम, हजरत लुकमान (عليه السلام) च्या इच्छांशी संबंधित होता. आतांपुढे मग त्याच इच्छा सांगण्यांत येत आहेत. ज्या लुकमान (عليه السلام) नी आपल्या मुलाजवळ व्यक्त केल्या होत्या. दर्म्यानच्या दोन महावाक्यांमध्ये, अल्लाह तबारक व तआलाने, एकूण इच्छा व्यक्त करतांना म्हणून, आई बापांबरोबर चांगल्या वर्तणुकीची ताकीद केली. ज्याचे एक कारण तर हे सांगण्यांत आले की, लुकमान عليه السلام नी ही इच्छा आपल्या मुलाजवळ व्यक्त केली नव्हती; कारण की, याच्यांत त्यांचा आपला वैयक्तिक फायदा पण होता. दुसरे, हे स्पष्ट होऊन जाते की, अल्लाहच्या एकेश्वरवाद आणि उपासनेनंतर, आईबापांची सेवा आणि आज्ञापालन आवश्यक आहे. तिसरे, असे की, शिर्क एवढा मोठा गुनाह आहे की, जर याचा हुकूम आईबाप जरी देतील, तरी त्यांची गोष्ट ऐकणे नाही.

३) अर्थ आहे की, मनुष्य बरे किंवा वाईट काम, कितीही लपवून करेल, अल्लाहतआलाकडून गुप्त राहू शकत नाही. कयामतच्या दिवशी अल्लाहतआला त्याला हजर करील; म्हणजे त्याचा मोबदला देईल. चांगल्या कामांचा चांगला मोबदला, वाईट कामांचा वाईट मोबदला. राईच्या दाण्याचे उदाहरण यासाठी, दिले की, तो इतका लहान असतो की, त्याचे काही वजन जाणवत नाही की, न वजनांत तो, तराजुचे पारडे, झुकवूंशकतो. अशाच प्रकारे (मोठा) खडक, (वस्तीपासून दूर, जंगल पर्वतांत) अत्यंत गुप्त, आणि अति सुरक्षित जागा आहे. हा विषय हदीसमध्ये सुद्धां सांगण्यांत आला आहे, सांगितले, ''जर तुमच्यातून कोणी मनुष्य, छिद्र नसलेल्या दगडांत सुद्धा, कर्म करील, ज्याला कोणी दरवाजा किंवा खिडकी नसावी, अल्लाहतआला त्याला लोकांवर जाहीर करून टाकीन. मग जरी ते कुठलेही कर्म असो !'' (मुसनद अहमद, २८/३) यासाठी की तो सुक्ष्मदर्शी आहे. त्याचे ज्ञान, गुप्तांत, अति गुप्त वस्तुला घेरून आहे. आणि 'खबीर' आहे. अंधाऱ्या रात्रीमध्ये चालणाऱ्या मुंगीच्या हालचालीशी सुद्धां, तो वाकबगार आहे.

४) इकामतिस् सलात, अमर बिल मआरूफ, नहीय अनिल मुनकर, आणि संकटांत सहनशिलता पत्करणे, यांचा यासाठी उल्लेख केला की, हे तिन्ही महत्त्वाच्या उपासना आणि चांगल्या कामांचा पाया आहे.

५) म्हणजे चर्चित गोष्टी, या कामांमधून आहे, ज्यांची अल्लाहतआलाने ताकीद केली आहे. आणि सेवकांवर त्यांना 'फर्ज' (अनिवार्य कर्तव्य) केले आहे. किंवा हे प्रोत्साहन आहे, प्रयत्न आणि हिम्मत निर्माण करण्याला; कारण की, प्रयत्न आणि हिंमतीशिवाय, चर्चित गोष्टींची अंमलबजावणी करणे शक्य नाही. काही भाष्यकारांजवळ, 'जालेका' चा मर्जा 'सब्र' आहे. याच्यापूर्वी 'अम्र बिल मअ्रुफ' आणि 'नही अनि्ल मुनकर' ची वसीयत आहे; आणि या मार्गांत, त्रास आणि संकटे, टर उडविणे अणि निंदा अवश्य वाट्यांला येतील. म्हणून याच्या नंतर लगेच सहनशिलतेचा उपदेश करून स्पष्ट करून दिले की धैर्याचा साथ सोडू नये की, ही मोठीच धैर्याच्या कामांमधून आहेत. आणि प्रयत्नवादी आणि हिंमतवान लोकांचे एक मोठे शस्त्र आहे; याच्याशिवाय तबलीगचे कर्तव्य पार पाडणे शक्य नाही.

وَلَا تُصَعِّرْ خَدَّكَ لِلنَّاسِ وَلَا تَمْشِ فِي الْأَرْضِ مَرَحًا ۖ إِنَّ اللَّهَ لَا يُحِبُّ كُلَّ مُخْتَالٍ فَخُورٍ ﴿١٨﴾

**आणि लोकांसमोर आपले तोंड वांकडे करूं नकोस; [१] आणि जमिनीवर ऐटून चालूं नकोस. [२] अल्लाहतआला कोण्या गर्व करणाऱ्या शेखीखोरास पसंत करीत नाही. ⑱**

وَاقْصِدْ فِي مَشْيِكَ وَاغْضُضْ مِن صَوْتِكَ ۚ إِنَّ أَنكَرَ الْأَصْوَاتِ لَصَوْتُ الْحَمِيرِ ﴿١٩﴾

**आणि आपल्या चालण्यांत मध्यमपणा ठेव, [३] आणि आवाज हळू ठेव. [४] खचित्‌च वाईटांत वाईट आवाज गाढवांचा आवाज आहे. ⑲**

أَلَمْ تَرَوْا أَنَّ اللَّهَ سَخَّرَ لَكُم مَّا فِي السَّمَاوَاتِ وَمَا فِي الْأَرْضِ وَأَسْبَغَ عَلَيْكُمْ نِعَمَهُ ظَاهِرَةً وَبَاطِنَةً ۗ وَمِنَ النَّاسِ مَن يُجَادِلُ فِي اللَّهِ بِغَيْرِ عِلْمٍ وَلَا هُدًى وَلَا كِتَابٍ مُّنِيرٍ ﴿٢٠﴾

**काय तू पाहत नाहीस की, अल्लाहतआलाने, पृथ्वी व आकाशाच्या प्रत्येक वस्तुला, तुमच्या कामांत लावून ठेवले आहे; [५] आणि तुम्हांस आपल्या जाहीर आणि गुप्त देणग्या, भरपूर देऊन ठेवल्या आहेत; [६] काही लोक अल्लाहच्या बाबतीत (काहीही) ज्ञानाशिवाय, आणि सन्मार्ग बोधाशिवाय, आणि तेज:पुंज पुस्तकाशिवाय, वादविवाद करतात [७] ⑳**

१) म्हणजे गर्व करूं नकोस, की, लोकांना क्षुल्लक लेखावे. आणि जेव्हा ते तुझ्यापाशी बोलतील, तर तूं त्यांच्यापासून तोंड फिरवून घ्यावे. किंवा संभाषणाच्या वेळी आपले तोंड फिरवून ठेवावे. 'सअ्र' एक आजार आहे. जो उंटाच्या डोके किंवा मानेत होतो. ज्याने त्याची मान फिरून जाते. येथे गर्व म्हणून तोंड फिरविण्याच्या अर्थांत, हा शब्द उपयोगांत आणला आहे. (इब्ने कसीर)

२) म्हणजे अशी चाल किंवा वर्तणूक, जिच्याने धनसंपत्ती, किंवा, मर्तबा व हुद्दा, किंवा शक्ती सामर्थ्यामुळे, अहंकार आणि गर्वाचे प्रदर्शन होते; हे अल्लाहला नापसंत आहे. यासाठी की, मनुष्य विवश, आणि क्षुल्लक आहे. अल्लाहतआलाला हेच पसंत आहे की, त्याने आपल्या ऐपतीप्रमाणे, नम्रताच धारण करून असावी; या मर्यादेच्या पुढे जाऊन, मोठेपणा मिरवूं नये. की, मोठेपणा फक्त अल्लाहलाच शोभतो. जो सर्व अधिकारांचा स्वामी, आणि सर्व खुब्यांचा धारण करणारा आहे. यासाठी हदीसमध्ये फर्माविले गेले आहे की, ''तो मनुष्य स्वर्गांत जाणार नाही, ज्याच्या मनांत एका राईच्या दाण्याबरोबर सुद्धां गर्व असेल.'' (मुसनद अहमद ४१२/१, तिर्मिझी) ''जो अहंकार म्हणून आपले कपडे घसरवित चालेल, (ओढित चालेल), अल्लाह त्याच्याकडे (कयामतच्या दिवशी) पहाणार नाही.'' (मुसनद अहमद १०१/५ व स.बुखारी) तथापि, अहंकाराचे प्रदर्शन केल्याशिवाय, अल्लाहच्या देणग्यांचे वर्णन, किंवा चांगला पोषाख, किंवा जेवण, वगैरेंचा उपयोग योग्य (जाएज) आहे.

३) म्हणजे चाल इतकी हळूंनसावी, जसा कोणी आजारी असावा. किंवा इतकी जोरांत नसावी की, सज्जनता आणि प्रतिष्ठेच्या विरूद्ध असावी. यालाच दुसऱ्या ठिकाणी अशा प्रकारे सांगितले, ''अल्लाहचे सेवक जमिनीवर प्रतिष्ठीतपणे आणि शांतीने चालतात.'' (सू.फुर्कान-६३)

४) म्हणजे ओरडून किंवा जोरात बोलूं नकोस; यासाठी की, जास्त मोठ्यांत आवाजांत बोलणे, चांगले असते, तर गाढवाचा आवाज सर्वांत चांगला समजला गेला असतां. परंतु असे नाही; किंबहुना गाढवाचा आवाज सर्वांत वाईट, आणि कर्कश आहे. याचसाठी हदीसमध्ये येते की, गाढवाचा आवाज ऐकाल, तेव्हांशैतानापासून, अल्लाहचा आश्रय मागा. (स.बुखारी, स.मुस्लिम वगैरे)

५) 'तसखीर' चा अर्थ आहे 'इनतफाअ' (फायदा उचलणे) ज्याला येथे, ''कामाला लावून दिले'' च्या शब्दात व्यक्त करून दिले. जसे आकांशातील सृष्टी, चंद्र, सूर्य, तारे, वगैरे आहेत. त्यांना अल्लाहतआलाने अशा पद्धतीने कार्यरत करून दिले आहे की, हे मानवांसाठी काम करीत आहे; आणि मनुष्यमात्र, त्यांच्याकडून लाभान्वयीत होत आहे. दुसरा अर्थ तसखीरचा, आज्ञांकीत करून देणे आहे. म्हणून पुष्कळशा जमिनीवरील सृष्टीला माणसाच्या ताब्यांत करून दिले आहे. ज्यांना मनुष्य आपल्या मन्शेप्रमाणे, उपयोगांत आणतो. जसे जमीन आणि जनावरे वगैरे. आहेत. जणूं'तसखीर' चा भावार्थ हा झाला की, आकाश आणि पृथ्वीच्या सर्व वस्तू, मानवांच्या फायद्यासाठी, कामांत लागलेल्या आहेत. मग जरी त्या मानवाच्या ताब्यांत, आणि त्याच्या हस्तक्षेपाखाली असो, किंवा त्याचा हस्तक्षेप आणि आज्ञापालनांत नसो. (फत्हुल कदीर)

६) 'उघड' ने त्या देणग्या अभिप्रेत आहेत, ज्यांची जाणीव, बुद्धी, अक्कल हुशारीने वगैरेंनी शक्य व्हावी. आणि आंतील (गुप्त) देणग्या त्या आहेत, ज्यांची जाणीव मनुष्याला होत नाही. या दोन्ही प्रकारच्या देणग्या इतक्या आहेत की, मनुष्य त्यांची गणती सुद्धा करू शकत नाही.

७) म्हणजे असे असून सुद्धां, लोक अल्लाहच्या बाबतीत वादविवाद करतात. कोणी त्याच्या अस्तित्वाबद्दल, कोणी त्याच्या बरोबर सरकतदार ठरविण्यांत, आणि कोणी त्याचे आदेश आणि धर्मशास्त्राच्या बाबतीत.

आश्वासन देऊन, युद्धाला तयार केले. आणि अशाप्रकारे हे यहूदी, इस्लाम आणि मुसलमानांच्या तमाम शत्रुंना, एकत्र करून, मदीनेवर हल्ला करण्यांत यशस्वी झालेत. मक्केच्या मुशरिकांचे अधिपत्य, अबू सुफयानकडे होते; त्यांच्यातून त्यांनी, 'उहद' च्या आसपास पडाव टाकून, जवळ जवळ मदीनेला घेरा टाकून दिला. यांची एकत्रित संख्या १० हजार होती; जेव्हा की मुसलमान ३ हजार होते. याशिवाय, दक्षिणेच्या बाजूला, यहूद्यांचे तिसरे घराणे, 'बनू कुरैजा' वसलेले होते. ज्यांच्याशी आतांपर्यंत मुसलमानांचा करार कायम, आणि मुसलमानांची मदत करण्याला ते बंधीत (पाबंद) होते. परंतु यांनापण बनू नजीर चे यहूदी सरदार, 'हुई बिन अखतब' ने फितवून, मुसलमानांवर जोरदार हल्ला करण्याच्या हवाल्याने, आपल्याबरोबर मिळवून घेतले. अशाप्रकारे, मुसलमान चाऱ्ही बाजूने, शत्रूंच्या विळख्यांत घेरले गेले. या प्रसंगी, ह.सलमान फारसी (ﷺ) च्या सल्ल्यानुसार, खंदक खोदण्यांत आले, ज्यामुळे शत्रुचे सैन्य, मदीनेच्या आंत येऊ शकले नाही; आणि मदीनेच्या बाहेरच मुक्काम ठोकून राहिले. तथापि मुसलमान या वेढ्याने, आणि शत्रुच्या एकत्रित हल्ल्याने भयभित होते. जवळपास एक महिन्यापर्यंत, हा वेढा कायम राहिला. आणि मुसलमान फारच भीती, आणि घबराटी मध्ये व्यस्त राहिले. सरशेवटी अल्लाहतआलाने अदृष्ट पर्दामागून, मुसलमानांची मदत केली. या महावाक्यांमध्ये याच घाबरवून टाकणाऱ्या परिस्थितीचे आणि अदृष्ट मदतीची चर्चा करण्यांत आली आहे. पहिल्या 'जुनूदून' ने अभिप्रेत काफिराच्या फौजा आहेत, ज्या एकत्र जमा होऊन आल्या होत्या. तीव्र आणि सोसाट्याच्या वाऱ्याने, तो वारा आहे, जो मोठ्या तुफान आणि वादळाच्या स्वरूपातंआला; ज्याने तंबू उपटून फेकले. जनावरे ढोर तोडून पळून गेले. चुलीवर पातेली, उलटी होऊन गेलीत; आणि सर्वांना पळून जाणे भाग पडले. हा तोच वारा होता, ज्याच्या बाबतीत, हदीसमध्ये येते, ''माझी मदत सबा (पूर्वेकडील वाऱ्या) ने केली गेली. आणि आद पश्चिमी वाऱ्याने नष्ट केले गेले.'' (स.बुखारी, स.मुस्लिम,) व 'जुनदन लम् तरौहा' ने अभिप्रेत देवदूत आहेत, जे मुसलमानांच्या मदतीसाठी आलेत. त्यांनी शत्रूंच्या मनातंअशी भीती आणि दहशत घालून दिली की, त्यांनी तेथून लगेच पळ काढण्यांतच आपली भलाई समजली.

३) याच्याने अभिप्रेत हे आहे की, सर्व बाजूंनी शत्रू येऊन गेलेत; किंवा वरून अभिप्रेत, 'गतफान' 'हवाजन' आणि दुसरे 'नज्द' चे मुशरिक लोक आहेत; आणि खालच्या बाजूने, कुरैश आणि त्यांचे पुष्कळसे समर्थक आणि मददगार.

४) हे मुसलमानांच्या त्या अवस्थेला जाहीर करणे आहे, जिच्यांत ते यावेळेला ग्रस्त होते.

५) म्हणजे मुसलमानांना भीती, युद्ध, भूक आणि वेढ्यांत, गर्क करून, त्यांची कसोटी घेण्यांत आली की, ज्यामुळे दांभिक लोक वेगळे होऊन जावेत.

६) म्हणजे अल्लाहतआलाकडून मदतीचे आश्वासन, एक फसवणूक होती. हे जवळ जवळ ७० दांभिक होते. त्यांच्या जिभेवर ती गोष्ट आली जी, यांच्या मनातं होती.

७) यसरिब हे त्या पूर्ण इलाख्याचे नांव होते, ज्यांत मदीना एक भाग होता. ज्याला येथे यसरिबने संबोधित केले गेले आहे. असे म्हणतात की याचे नांव यसरिब यासाठी पडले की, कोण्या काळी, अमालिका मधून कोणी येथे पडाव टाकला होता, ज्याचे नांव यसरिब बिन अमील होते. (फत्हूल कदर)

८) म्हणजे मुसलमानांच्या सैन्यांत रहाणे तर फारच भयानक आहे; आपआपल्या घरी परत चला.

९) म्हणजे बनू कुरैजा कडून हल्ल्याचा धोका आहे. अशा प्रकारे घरवाल्यांच्या प्राण, संपत्ती आणि इज्जत आबरूंही धोक्यात आहे.

१०) म्हणजे जो धोका ते सांगतात, तो नाही. आणि या बहाण्याने ते पळूं इच्छितात. 'अव्रतून' चा शब्दकोशीय अर्थ, आणि नेहमीचा परिचित् अर्थासाठी पहा, सू.नूर आ.५८ चा समास.

وَلَوْ دُخِلَتْ عَلَيْهِمْ مِّنْ اَقْطَارِهَا ثُمَّ سُئِلُوا الْفِتْنَةَ
لَاٰتَوْهَا وَمَا تَلَبَّثُوْا بِهَآ اِلَّا يَسِيْرًا ﴿١٤﴾

**आणि जर मदीनेच्या चोहूबाजूने, त्यांच्यावर सैन्ये दाखल केली जातील, मग त्यांना फिसाद करण्यांस सांगण्यात येईल, तर हे अवश्य त्याला करून टाकतील. आणि काही ढील ही देतील तर अशीच (थोडीशी)[१] ⑭**

وَلَقَدْ كَانُوْا عَاهَدُوا اللّٰهَ مِنْ قَبْلُ لَا يُوَلُّوْنَ الْاَدْبَارَ ؕ
وَكَانَ عَهْدُ اللّٰهِ مَسْئُوْلًا ﴿١٥﴾

**आणि याच्यापूर्वी तर, त्यांनी अल्लाहला वचन दिले होते की, पाठ फिरविणार नाही; [२] अल्लाहतआलाला दिलेल्या वचनाची विचारपूस अवश्य[३] होणे आहे. ⑮**

قُلْ لَّنْ يَّنْفَعَكُمُ الْفِرَارُ اِنْ فَرَرْتُمْ مِّنَ الْمَوْتِ
اَوِ الْقَتْلِ وَاِذًا لَّا تُمَتَّعُوْنَ اِلَّا قَلِيْلًا ﴿١٦﴾

**सांगून द्या की, जर तुम्ही मृत्यूकडून किंवा ठार होण्याच्या भीतीने पळाल, तर हे पळून जाणे तुम्हांस काहीही कामा येणार नाही. आणि या वेळी तुम्ही फारच कमी लाभान्वयीत केले जाल. [४] ⑯**

قُلْ مَنْ ذَا الَّذِيْ يَعْصِمُكُمْ مِّنَ اللّٰهِ اِنْ اَرَادَ بِكُمْ
سُوْٓءًا اَوْ اَرَادَ بِكُمْ رَحْمَةً ؕ وَلَا يَجِدُوْنَ لَهُمْ مِّنْ
دُوْنِ اللّٰهِ وَلِيًّا وَّلَا نَصِيْرًا ﴿١٧﴾

**यांना विचारा तर खरे! की जर अल्लाहतआला तुमचे काही वाईट करूं इच्छील, किंवा तुमच्यावर काही रहमत करूं इच्छील, तर कोण आहे जो तुम्हांस वाचवूंशकेल, (किंवा तुमच्यापासून रोकूं शकेल?) [५] आपल्याकरीतां, अल्लाहतआलाशिवाय, कोणी पुरस्कर्ता आणि मददगार पावणार नाहीत ⑰**

قَدْ يَعْلَمُ اللّٰهُ الْمُعَوِّقِيْنَ مِنْكُمْ وَالْقَآئِلِيْنَ لِاِخْوَانِهِمْ
هَلُمَّ اِلَيْنَا ۚ وَلَا يَاْتُوْنَ الْبَاْسَ اِلَّا قَلِيْلًا ﴿١٨﴾

**अल्लाहतआला तुमच्यातूंन त्यांना (पण) फार चांगल्या प्रकारे ओळखतो, जे दुसऱ्यांना मना करतात, आणि आपल्या भाऊबंदांना म्हणतात की, आमच्या जवळ [६] चालले या! आणि कधी कधी (थोडेसेच) लढाईत येऊन जातात. [७] ⑱**

اَشِحَّةً عَلَيْكُمْ ۖۚ فَاِذَا جَآءَ الْخَوْفُ رَاَيْتَهُمْ يَنْظُرُوْنَ
اِلَيْكَ تَدُوْرُ اَعْيُنُهُمْ كَالَّذِيْ يُغْشٰى عَلَيْهِ مِنَ الْمَوْتِ ۚ
فَاِذَا ذَهَبَ الْخَوْفُ سَلَقُوْكُمْ بِاَلْسِنَةٍ حِدَادٍ اَشِحَّةً
عَلَى الْخَيْرِ ؕ اُولٰٓئِكَ لَمْ يُؤْمِنُوْا فَاَحْبَطَ اللّٰهُ اَعْمَالَهُمْ ؕ
وَكَانَ ذٰلِكَ عَلَى اللّٰهِ يَسِيْرًا ﴿١٩﴾

**तुमची मदत करण्यांत, (पूर्ण) कंजुष आहेत; [८] मग जेव्हांभीती दहशतचा प्रसंग येऊन जाईल, तर आपण त्यांना पाहाल की, तुमच्याकडे स्थिर नजरेने पाहतात. आणि त्यांचे डोळे, अशा प्रकारे फिरतात, जसे त्या माणसाचे, ज्यावर मृत्यूची मुर्छा यावी. [९] मग जेव्हां भय निघून जाते, तेव्हा, तुमच्यावर आपल्या तीव्र वाचेने मोठ्या गोष्टी सांगतात; [१०] द्रव्याचे फारच लोभी आहेत; [११] त्यांनी ईमान आणलेच नाही; [१२] अल्लाहतआलाने त्यांची सर्व कर्मे, अक्रित करून टाकली आहेत; [१३] आणि अल्लाहतआलासाठी ही फारच सोपीशी गोष्ट[१४] आहे. ⑲**

يَحْسَبُوْنَ الْاَحْزَابَ لَمْ يَذْهَبُوْا ۚ وَاِنْ يَّاْتِ الْاَحْزَابُ
يَوَدُّوْا لَوْ اَنَّهُمْ بَادُوْنَ فِي الْاَعْرَابِ يَسْاَلُوْنَ عَنْ
اَنْۢبَآئِكُمْ ؕ وَلَوْ كَانُوْا فِيْكُمْ مَّا قٰتَلُوْٓا اِلَّا قَلِيْلًا ﴿٢٠﴾ ٢/١٣ ١٨

**समजतात आतांपर्यंत सैन्य चालली गेली नाहीत. [१५] आणि जर फौजा येऊन लागतील, तर ते हांव करतील ते विराण जागी, किंवा जंगलात रहाण्यांबरोबर असते, तर तुमचे अहवाल दर्याफ्त करीत राहिले [१६] असते. जर ते तुमच्यात उपस्थित असले, असते (तरी) लढाई न करते फक्त नावासाठी[१७] ⑳** २/१३ १८

१) म्हणजे मदीना किंवा त्यांच्या घरांमधून, चौहोबाजूंनी, शत्रु दाखल होऊन जातील, आणि त्यांच्याकडे मागणी करतील की, तुम्ही कुफ्र आणि शिर्ककडे, पुन्हां दुसऱ्यांदा परत येऊन जा; तर हे जरा पण उसंत घेणार नाही, आणि यावेळी, घरे असुरक्षित असण्याची सबब पण सांगणार नाहीत, किंबहुना लगेच शिर्कच्या मागणीला मान्य करतील. अर्थ हा आहे की, कुफ्र आणि शिर्क यांना आवडते आहे. आणि याच्याकडे ते लपकतात.

२) सांगण्यात येते की, हे दांभिकलोक (मुनाफिकीन) बद्रच्या लढाईपर्यंत, मुसलमान झाले नाहीत. परंतु जेव्हां मुसलमान विजयी होऊन, आणि गनीमतचा माल घेऊन, परत आलेत, तेव्हां त्यांनी न फक्त हे की, इस्लाम जाहीर केला, किंबहुना हे वचन पण दिले की, जेव्हा कधी काफिरांशी सामना होईल, तेव्हां ते, मुसलमानांबरोबर मिळून जरूर

लढतील. येथे त्यांना याच वचनाची आठवण करून देण्यांत येत आहे.
३) म्हणजे त्यांना या वचनाच्या पूर्ततेची मागणी केली जाईल. आणि विश्वासघाताबद्दल ते शिक्षेला पात्र होतील.
४) म्हणजे मृत्युपासून तर कोठे ही पळण्याला जागा नाही. जरी युद्धाच्या रणांगणावरून पळून जरी आला, तर काय फायदा ? काही काळानंतर मृत्युचा प्याला तरी सुद्धां, तर प्यावयाचाच आहे.
५) म्हणजे तुम्हाला नष्ट करणे, आजारी पाडणे, किंवा धन व संपत्तीमध्ये, नुकसान पोहचविणे, किंवा दुष्काळांत व्यस्त करूं इच्छील, तर कोण आहे, जो तुम्हांस या पासून वांचवेल ? किंवा आपली रहमत आणि कृपा करूं इच्छील, तर त्याला मना करील ?
६) हे म्हणणारे दांभिक होते. जे आपल्या दुसऱ्या साथीदारांना पण, मुसलमानांबरोबर लढाईला शामील होण्याला मना करीत होते.
७) कारण की ते मृत्युच्या भीतीने, मागेच रहात असत.
८) म्हणजे तुमच्या बरोबर खंदक खोदून, तुमची मदत करण्यांत, किंवा अल्लाहच्या मार्गांत खर्च करण्यांत, किंवा तुमच्याबरोबर मिळून लढण्यांत, कंजुष आहेत.
९) हे त्यांच्या भित्रेपणाचे आणि कमी हिंमतीच्या अवस्थेचे वर्णन आहे.
१०) म्हणजे आपल्या बहादुरी आणि मर्दांगीच्या बाबतीत मोठमोठ्या गप्पा मारतात; ज्या निव्वळ खोट्या असतात. किंवा गनीमत (धर्मयुद्धांत मिळालेली संपत्ती) च्या वाटणीच्या वेळी, आपल्या जिभेच्या तिव्रतेने, आणि जास्त बोलण्याने, लोकांना प्रभावीत करून, जास्तीत जास्त संपत्ती मिळविण्याचा प्रयत्न करतात. ह.कतादा ﷺ म्हणतात, गनीमतच्या वांटणीच्या वेळेस, हे सर्वांत जास्त कंजुष व सर्वांत जास्त वाईट वाटा घेणारे, आणि लढाईच्या वेळेस सर्वांत जास्त भित्रे, आणि साथीदारांना, तसेच सोडून, पळून जाणारे आहेत.
११) किंवा दुसरा भावार्थ आहे की, भलाईची भावना पण त्यांच्यात नाही. म्हणजे चर्चित वाईटपणा आणि कुचराईच्या बरोबरच, ते भलाईपासून पण वंचित आहेत.
१२) म्हणजे मनापासून किंवा हे दांभिक आहेत. कारण की यांची अंत:करणे कुफ्र आणि द्वेषाने भरलेली आहेत.
१३) यासाठी की ते मुशरिक आणि काफिरच आहेत. आणि मुशरिक आणि काफिरांची कर्मे, निरर्थक आहेत. ज्यावर काही मोबदला आणि पुण्यप्रतिफल नाही. किंवा 'अहबत' 'अज्हर' च्या अर्थांत आहे; म्हणजे त्यांच्या कर्मांच्या व्यर्थ जाण्याला, जाहीर करून टाकले. यासाठी की, त्यांची कर्मे अशी नाहीतच की, ते पुण्यप्रतिफळाला लायक असावेत; आणि अल्लाहने त्यांना व्यर्थ करून टाकावे. (फत्हुल कदीर)
१४) त्यांच्या कर्मांचे बर्बाद करून देणे, किंवा त्याचे दांभिकत्त्व.
१५) म्हणजे या दांभिकांचे भित्रेपण, कमहिम्मती, आणि भय व दहशतीची ही स्थिती आहे की, काफिरांचे समूह जरी अयशस्वी होऊन, परत जाऊन चुकले आहेत; तरी हे आतांपर्यंत असे समजतात की, ते आतापर्यंत आपल्या मोर्चांत व तंबूत तसेच आहेत.
१६) म्हणजे खरोखर जर ते काफिरांचे समूह, दुसऱ्यांदा लढाईच्या इराद्याने, परत येऊन जातील, तेव्हां दांभिकांची इच्छा ही असेल की, ते मदीना शहरांत राहण्याऐवजी, बाहेर विराण्यात खेडूत वासियांच्या बरोबर असावे; आणि तेथे लोकांना, तुमच्या बाबतीत विचारत रहावे की मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) आणि त्यांचे साथी नष्ट झाले किंवा नाही ? किंवा काफिरांचे सैन्य विजयी झाले की, पराजीत ?
१७) केवळ शर्मेखातर किंवा आपल्या मातृभूमीवाल्यांच्या हिंमतीमुळे; याच्यांत त्या लोकांसाठी कडक धमकी आहे, जे जिहादपासून पळ काढतात; किंवा यापासून मागे रहातात.

لَقَدْ كَانَ لَكُمْ فِيْ رَسُوْلِ اللّٰهِ اُسْوَةٌ حَسَنَةٌ لِّمَنْ كَانَ يَرْجُوا اللّٰهَ وَالْيَوْمَ الْاٰخِرَ وَذَكَرَ اللّٰهَ كَثِيْرًا ﴿٢١﴾

खचितच् तुमच्याकरीतां, रसूलुल्लाह (सल्ल.) मध्ये, एक उमदा नमुना आहे; [१] प्रत्येक त्या माणसासाठी, जो अल्लाहतआलाची आणि कयामतच्या दिवसाची खात्री बाळगतो; आणि अल्लाहचे भरपूर स्मरण करीत असेल [२] (२१)

وَلَمَّا رَاَ الْمُؤْمِنُوْنَ الْاَحْزَابَ قَالُوْا هٰذَا مَا وَعَدَنَا اللّٰهُ وَرَسُوْلُهٗ وَصَدَقَ اللّٰهُ وَرَسُوْلُهٗ وَمَا زَادَهُمْ اِلَّاۤ اِيْمَانًا وَّتَسْلِيْمًا ﴿٢٢﴾

आणि ईमानवाल्यांनी जेव्हा (काफिरांच्या) सैन्याला पाहिले, (आपोआप) बोलून पडले की, यांचाच वायदा आम्हांस, अल्लाहतआलाने आणि त्याच्या पैगंबरा (सल्ल.) ने दिला होता; आणि अल्लाह आणि त्याचे पैगंबर यांनी [३] खरे सांगितले. हे तर ईमानांत, आणि आज्ञाधारकपणांत आणखी वाढून गेलेत [४] (२२)

مِنَ الْمُؤْمِنِيْنَ رِجَالٌ صَدَقُوْا مَا عَاهَدُوا اللّٰهَ عَلَيْهِ ۚ فَمِنْهُمْ مَّنْ قَضٰى نَحْبَهٗ وَمِنْهُمْ مَّنْ يَّنْتَظِرُ ۖ وَمَا بَدَّلُوْا تَبْدِيْلًا ﴿٢٣﴾

ईमानवाल्यांमध्ये ते जवान मर्द आहेत; ज्यांनी अल्लाहतआलाशी जे करार केले होते, त्यांना खरे करून दाखविले; [५] काहींनी तर आपले करार पूर्ण करून घेतले; [६] आणि काही (संधीची) वाट पहात आहेत. आणि त्यांनी याच्यांत किंचितही फेरबदल केला नाही. [७] (२३)

لِّيَجْزِيَ اللّٰهُ الصّٰدِقِيْنَ بِصِدْقِهِمْ وَيُعَذِّبَ الْمُنٰفِقِيْنَ اِنْ شَآءَ اَوْ يَتُوْبَ عَلَيْهِمْ ۗ اِنَّ اللّٰهَ كَانَ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿٢٤﴾

कारण की, अल्लाहतआलाने खऱ्यांना, त्यांच्या खरेपणाचा बदला द्यावा; आणि जर इच्छील, तर दांभिकांना शिक्षा देईल; किंवा त्यांचे प्रायश्चित्त कबूल करो [८] अल्लाहतआला मोठाच क्षमाकर्ता आणि दयाळूंआहे. (२४)

وَرَدَّ اللّٰهُ الَّذِيْنَ كَفَرُوْا بِغَيْظِهِمْ لَمْ يَنَالُوْا خَيْرًا ۗ وَكَفَى اللّٰهُ الْمُؤْمِنِيْنَ الْقِتَالَ ۗ وَكَانَ اللّٰهُ قَوِيًّا عَزِيْزًا ﴿٢٥﴾

आणि अल्लाहतआलाने काफिरांना, रागाने भरलेल्या स्थितीतच, काहीही फायदा [९] न होता, परत फिरवून दिले. आणि अल्लाहतआला स्वत:च ईमानवाल्यांना पुरेसा होऊन गेला. [१०] अल्लाहतआला बलवान आणि समर्थ आहे. (२५)

وَاَنْزَلَ الَّذِيْنَ ظَاهَرُوْهُمْ مِّنْ اَهْلِ الْكِتٰبِ مِنْ صَيَاصِيْهِمْ وَقَذَفَ فِيْ قُلُوْبِهِمُ الرُّعْبَ فَرِيْقًا تَقْتُلُوْنَ وَتَاْسِرُوْنَ فَرِيْقًا ﴿٢٦﴾

आणि ज्या ग्रंथधारी लोकांनी यांच्याशी हात मिळवणी करून घेतली होती, त्यांना पण अल्लाहतआलाने त्यांच्या किल्ल्यातून बाहेर काढून आणले आणि त्यांच्या अंत:करणांत धाक बसवून दिला. की, तुम्ही त्यांच्या एका पक्षाला ठार करीत आहांत आणि एका पक्षाला कैदी बनवित आहात (२६)

وَاَوْرَثَكُمْ اَرْضَهُمْ وَدِيَارَهُمْ وَاَمْوَالَهُمْ وَاَرْضًا لَّمْ تَطَـُٔوْهَا ۗ وَكَانَ اللّٰهُ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرًا ﴿٢٧﴾ ع ٣ ٧ ١٩

ع ३ ७ ११ आणि त्याने तुम्हांस त्यांच्या जमिनीचा, आणि त्यांच्या घरादारांचा आणि त्यांच्या संपत्तीचा वारस करून टाकले. [११] आणि त्या जमिनीचा सुद्धा, ज्यावर तुम्ही अजून पाऊल पण ठेवले नव्हते. [१२] अल्लाहतआला सर्व काही करण्यांस समर्थ आहे. (२७)

१) म्हणजे हे मुसलमानांनो! आणि दांभिकांनो!! तुम्हासर्वांसाठी रसूलुल्लाह ﷺ च्या व्यक्तीत्वाचा, उत्कृष्ट नमुना आहे. बस तुम्ही जिहादमध्ये आणि सहनशिलता आणि दृढतेमध्ये, याचेच अनुकरण करा. आमचा हा पैगंबर जिहादमध्ये उपाशी राहिला, येथपावेतो की, त्याला पोटावर दगड बांधावे लागले; त्याचा चेहरा जखमी होऊन गेला; त्याचा पुढील दांत तुटून गेला; खंदक आपल्या हाताने खोदले; आणि जवळ जवळ एक महिना शत्रुंसमोर दृढ जमून राहिले. हे महावाक्य जरी अहजाबच्या लढाईच्या संदर्भात अवतीर्ण झाले आहे, ज्याच्यांत युद्धप्रसंगी, विशेष म्हणून रसूलुल्लाह ﷺ चा फार चांगला नमुना समोर ठेवण्याचा आणि त्याचे अनुकरण करण्याचा हुकूम दिला गेला आहे. परंतु हा हुकूम सार्वत्रिक आहे. म्हणजे आपण ﷺ चे सर्व कथन, सर्व कृत्ये, आणि परिस्थितीमध्ये, मुसलमानांसाठी आपले अनुकरण, आवश्यक आहे. मग जरी, यांचा संबंध उपासनांशी, किंवा सामाजिक असेल, जीवनाशी, किंवा राजकारणाशी असेल. जीवनाच्या प्रत्येक अंगात, आपले मार्गदर्शन, आज्ञापालनायोग्य आहे.

२) याच्याने हे स्पष्ट होऊन गेले की, रसूलुल्लाह ﷺ च्या नमुन्याचा तोच अंगीकार करील, जो परलोकांत अल्लाहच्या भेटीचा विश्वास बाळगतो, आणि अल्लाहचे नामस्मरण भरपूर भरपूर करतो. आज मुसलमानपण सर्वसाधाररपणे, या दोन वैशिष्ट्यांपासून वंचित आहेत. म्हणून, रसूलुल्लाह (ﷺ) च्या नमुन्यांचे काही महत्त्व त्यांच्या मनांत नाही. याच्यातून जे मजहबवाले आहेत, त्याचे पेशवा, इमाम, पीर, आणि मशाइख आहेत. आणि जे दुनियावाले आणि राजकारणी आहेत, त्यांचे मार्गदर्शक पाश्चिमात्य धनी आहेत. रसूलुल्लाह ﷺ शी, श्रद्धेचे तोंडी दावे, मोठे आहेत; परंतु

त्यांना मार्गदर्शक आणि इमाम मानण्यांस, त्यांच्यातून कोणीही तयार नाही. फइल्लाहिल मुशतका.
३) म्हणजे ढांभिकांनी तर, शत्रुंची भयंकर संख्या, आणि परिस्थितीचे काठिण्य पाहून, म्हटले होते की, अल्लाह व रसूलचे वायदे, फसवणूक होती. यांच्या उलट ईमानवाल्यांनी म्हटले, अल्लाह व रसूलने जो वायदा केला आहे की, कसोटी आणि परीक्षेतून पार पाडल्यानंतर, तुम्हांस विजय आणि मदत दिली जाईल, तो खरा आहे.
४) म्हणजे परिस्थितीच्या तिव्रतेने आणि भयानकतेने, त्यांच्या ईमानाला डांवाडोल होऊ दिले नाही; किंबहुना त्यांच्या ईमानांत, आणि आज्ञापालनाच्या भावनेत, आणि मानण्यांत, आणखी वाढ करून दिली. याच्यांत या गोष्टीचे प्रमाण आहे, की लोक आणि त्यांच्या वेगवेगळ्या परिस्थितीच्या अनुषंगाने, ईमान आणि त्याच्या सामर्थ्यांत कमी जास्त होते, जसा की, मुहद्दिसीनचा मसलक (मानणे) आहे.
५) हे महावाक्य, त्या काही सहाबांच्या बाबतीत अवतीर्ण झाले आहे, ज्यांनी या प्रसंगी प्राण बहाल करून टाकण्याचे, विचित्र आणि आश्चर्यकारक कमाली दाखविल्या होत्या. आणि त्यांच्यातच ते सहाबा पण शामील आहेत, ज्यांनी बद्रच्या युद्धांत भाग घेऊं शकला नव्हता. पण त्यांनी हा पक्का विचार करून ठेवला होता की, आता भविष्यांत कोणी युद्ध पुढे आले तर त्या जिहादमध्ये भरपूर वांटा घेऊ. जसे नजर बिन अन्स ﷺ वगैरे. जे शेवटी लढत लढत, उहदच्या युद्धांत शहीद झाले. यांच्या शरीरावर, तलवार, भाले आणि बाणांच्या ८० पेक्षा जास्त जखमा होत्या. हौतात्म्य पत्करल्यानंतर, त्यांच्या बहिणीने, त्यांना त्यांच्या बोटाच्या पेराने ओळखले. (मुसनद अहमद, जि.४, पृ.१९३)
६) 'नहब्' चा अर्थ, वचन, नवस आणि मृत्युचा केला गेला आहे. अर्थ आहे की, या खऱ्या लोकांमधून काहींनी तर आपले वचन किंवा नवस पूर्ण करीत, हौतात्म्याचा प्याला पिऊन घेतला आहे.
७) आणि दुसरे ते आहेत, ज्यांनी आतापर्यंत हौतात्म्याच्या स्वभाग्य मिळाल नाही तथापि याच्या आवडीने, जिहादमध्ये सहभाग घेत राहतात; आणि हौतात्म्याच्या सद्भाग्याची आकांक्षा बाळगतात. आपल्या या नवस किंवा वचनांत त्यांनी बदल केला नाही.
८) म्हणजे त्यांना इस्लाम कबूल करण्याची सुबुद्धी देऊन दे!
९) म्हणजे मुशरिक जे वेगवेगळ्या दिशेने जमा होऊन आले होते, की मुसलमानांना मिटवून टाकावे. अल्लाहने त्यांना त्यांच्या क्रोधासहीत परत फिरवून लावले. न ऐहिक संपत्ती त्यांच्या हाती लागली, न त्यांना परलोकांत काही पुण्य प्रतिफळ मिळेल. कुठल्याही प्रकारची भलाई त्यांच्या नशीबी आली नाही.
१०) म्हणजे मुसलमानांना त्यांच्याशी लढण्याची आवश्यकताच पडली नाही. किंबहुना अल्लाहतआलाने वारा आणि देवदुतांच्या मार्फत, आपल्या ईमानवाल्या सेवकांच्या मदतीचा सामान पोहचवूंन दिला. याचसाठी नबी ﷺ नी फर्माविले, ''एका अल्लाहशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. त्याने आपला वायदा सत्य करून दाखविला; आपल्या सेवकाची मदत केली; आपल्या सैन्याला यशस्वी केले. आणि सर्व समूहांना एकटे, त्यानेच मात दिली. त्याच्या नंतर कुठलीही वस्तूं नाही.'' (स.बुखारी) ही दुआ, हज्, उमरा, जिहाद आणि प्रवासाहून परतीनंतर, सुद्धा म्हणावयास पाहिजे
११) याच्यांत बनी कुरैजाच्या लढाईचा उल्लेख आहे. जसे की, पहले येऊन चुकले की, या घराण्याने वचनभंग करून, अहजाबच्या लढाईत, मुशरिक लोक आणि दुसऱ्या यहुद्यांचा साथ दिला होता. म्हणून अहजाबच्या लढाईनंतर, परत येऊन, रसूलुल्लाह ﷺ, आतांआंघोळच करून चुकले होते की ह. जिब्रईल ﷺ येऊन पोहचले आणि म्हटले की, आपण शस्त्रे ठेवून दिलीत? आम्ही देवदुतांनी तर ठेवली नाहीत. चला! आतां बनू कुरैजाशी, निपाटवयाचे आहे. मला याचसाठी, अल्लाहने आपल्याकडे पाठविले आहे. म्हणून आपण (ﷺ) नी मुसलमानांत घोषणा करून टाकली, किंबहुना त्यांना ताकीद दिली की, असरची नमाज, तेथे जाऊन पढावयाची आहे. त्यांची वस्ती मदीनेपासून थोड्याच मैलांवर होती. ते आपल्या किल्ल्यांत बंद होऊन गेलेत. बाहेरून मुसलमानांनी त्याला वेढां देऊन दिला. जो कमी जास्त पंचवीस दिवस चालूं होता. सरशेवटी त्यांनी सअद बिन मआजला आपला न्याय निवाडा करणारा म्हणून मान्य करून टाकले की, ते जो काही निर्णय देतील, आम्हांस तो मान्य राहील. म्हणून त्यांनी हा निर्णय दिला की, त्यांच्यातून लढणाऱ्या लोकांना ठार केले जावे, आणि मुलांना आणि स्त्रीयांना कैदी बनवून टाकले जावे. आणि त्यांची संपत्ती मुसलमानांमध्ये वाटून टाकली जावी. नबी ﷺ नी हा फैसला ऐकून म्हटले की, हाच निर्णय आकाशांवर सुद्धा, अल्लाहतआलाचा पण आहे. याच्याप्रमाणे त्यांच्या लढाऊ माणसांची शिरे उडवून देण्यांत आली आणि मदीनेला त्यांच्या अपवित्र अस्तित्वाने, पवित्र करून देण्यांत आले. (पहावे स.बुखारी) 'अन्जला' किल्ल्यांच्या खाली उतरून दिले. 'जाहरूहुम्' काफिरांची त्यांनी मदत केली.
१२) काहींनी याच्याने खैबर ची भूमी अभिप्रेत धरली आहे. कारण की, याच्या नंतरच, ६ हिजरीमध्ये, हुदैबियाच्या तहानंतर, मुसलमानांनी खैबर जिंकले आहे. काहींनी म्हटले की, हे मक्का आहे; आणि काहींनी इराण आणि रोमला याच्यासाठी, योग्य ठरविले आहे. आणि काहींच्या जवळ सर्व त्या भूमी आहेत, ज्या कयामत पर्यंत मुसलमान जिंकतील (फत्हुल कदीर)

يٰۤاَيُّهَا النَّبِيُّ قُلْ لِّاَزْوَاجِكَ اِنْ كُنْتُنَّ تُرِدْنَ الْحَيٰوةَ الدُّنْيَا وَزِيْنَتَهَا فَتَعَالَيْنَ اُمَتِّعْكُنَّ وَاُسَرِّحْكُنَّ سَرَاحًا جَمِيْلًا ﴿٢٨﴾

**हे पैगंबरा ! आपल्या पत्नींना सांगून द्या की, जर तुम्ही इहलौकीक आयुष्य, आणि त्याच्या थाटमाटाचे अभिलाषी आहांत तर, या ! मी तुम्हांस काही देऊन संवरून, चांगुलपणाने सोडून देईन** (२८)

وَاِنْ كُنْتُنَّ تُرِدْنَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ وَالدَّارَ الْاٰخِرَةَ فَاِنَّ اللّٰهَ اَعَدَّ لِلْمُحْسِنٰتِ مِنْكُنَّ اَجْرًا عَظِيْمًا ﴿٢٩﴾

**आणि जर तुमची अभिलाषा, अल्लाह व त्याचा पैगंबर आणि परलोकाचे घर आहे, तर (विश्वास ठेवा की) तुमच्यातून ज्या सदाचरणी असतील, त्यांच्याकरतांअल्लाहतआलाने मोठमोठे मोबदले तयार करून ठेवले आहेत**[१] (२९)

يٰنِسَآءَ النَّبِيِّ مَنْ يَّاْتِ مِنْكُنَّ بِفَاحِشَةٍ مُّبَيِّنَةٍ يُّضٰعَفْ لَهَا الْعَذَابُ ضِعْفَيْنِ ؕ وَكَانَ ذٰلِكَ عَلَى اللّٰهِ يَسِيْرًا ﴿٣٠﴾

**अहो पैगंबराच्या पत्न्यांनो! तुमच्यातून कोणी पण गैरवर्तणूक करेल, तिला दुहेरी शिक्षां दिली जाईल;** [२] **आणि अल्लाहतआलाजवळ ही फारच सोपी (शी गोष्ट) आहे.** (३०)

१) विजयाच्या परिणामांत, जेव्हां मुसलमानांची परिस्थिती पूर्वीच्या पेक्षां, काही चांगलीशी होऊन गेली, तेव्हांअन्सार आणि मुहाजिरीनच्या स्त्रियांना पाहून, पैगंबराच्या पत्नींनी सुद्धां, घरखर्चांत वाढ करण्याची मागणी केली. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, हे कारण की, साध्या राहणीमानाला पसंत करीत होते, म्हणून आपल्या पत्न्यांच्या या मागणीवर फारच दु:खी झाले आणि पत्नीपासून वेगळे राहूं लागले, जे एक महिन्यांपर्यंत चालू राहिले. सरशेवटी अल्लाहतआलाने हे महावाक्य अवतरीत केले. याच्यानंतर आपण (ﷺ) नी सर्वांत प्रथम हजरत आयशा رضي الله عنها ला हे महावाक्य ऐकवून, त्यांना अधिकार दिला; तथापि त्यांना सांगितले की, तुम्ही आपणच आपला निर्णय करण्याऐवजी, आपल्या आई बापांबरोबर सल्लामसलत केल्यानंतरच काही पाऊल उचलावे. ह.आयेशा رضي الله عنها नी म्हटले, हे कसे होऊ शकते कि मी आपल्या (सल्ल.) बाबतीत सल्लामसलत करावी? किंबहुना मी अल्लाह व रसूलला पसंत करते. हीच गोष्ट दुसऱ्या पत्नींनी पण सांगितली. आणि कोणी पण, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला सोडून, ऐहिक सुख समाधानाला प्राधान्य दिले नाही. (स.बुखारी) यावेळी आपण ﷺ च्या विवाह बंधनांत ९ पत्न्या होत्या. पांच कुरैशमधून, होत्या ह.आयेशा, हफसा, उम्मे हबीबा, सौदा, आणि उम्मे सल्मा. आणि चार त्यांच्याशिवाय, म्हणजे ह.सफिया, मैमुना, जैनब आणि जुवेरिया रजी. अल्लाह अन्हुम होत्या. काही लोक पतीपासून वेगळे होण्याच्या अधिकाराला, जे पत्नीला देण्यात येते, तलाक ठरवतात. परंतु ही गोष्ट बरोबर नाही. बरोबर गोष्ट ही आहे की, वेगळेपणा अंगीकारल्यानंतर, जर स्त्री वेगळे पणाला पसंत करेल, तर मग खचित्च तलाक होऊन जाईल. (आणि हा तलाक पण रजई होईल, न की, बायना जसे की, अहनाफ आणि दुसऱ्या काही धर्म पंडितांचा मसलक आहे.) तथापि जर स्त्री वेगळे पणाला अंगीकारत नाही तर तलाक होणार नाही. जसे पैगंबराच्या पत्न्यांनी वेगळे रहाण्याच्या ऐवजी, रसूलुल्लाह ﷺ च्या घरांत रहाणेच पसंत केले. तर या अधिकाराला तलाक समजले गेले नाही. (स.बुखारी स. मुस्लिम)

२) कुरआनामध्ये, 'अल् फाहिशाह' ला व्याभिचाऱ्याच्या अर्थांत वापरण्यांत आले आहे. परंतु 'फाहिशाह' ला वाईटासाठी, जसे येथे आहे. येथे त्याचा अर्थ गैरवर्तणूक आणि अयोग्य चालचुणूक, चा आहे. कारण की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बरोबर गैरवर्तणुक आणि अयोग्य चाल चुणूक त्यांना इजा पोहचवणे आहे. असे करणे कुफ्र आहे. याशिवाय, पत्न्या, स्वत:पण उच्च स्थानावर विराजमान होत्या. आणि उच्च मर्तबावाल्यां लोकांच्या, मामुली चुका पण, मोठया धरल्या जातात. म्हणून त्यांना दुहेरी शिक्षेची चेतावणी देण्यांत आली आहे.

وَمَنْ يَّقْنُتْ مِنْكُنَّ لِلّٰهِ وَرَسُوْلِهٖ وَتَعْمَلْ صَالِحًا نُّؤْتِهَآ اَجْرَهَا مَرَّتَيْنِ ۙ وَاَعْتَدْنَا لَهَا رِزْقًا كَرِيْمًا ﴿٣١﴾

आणि तुमच्यातून जी कोणी, अल्लाहचे आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करील, आणि चांगली कामे करील, आम्ही तिला दुप्पट मोबदला देऊ; [१] आणि तिच्यासाठी आम्ही उत्कृष्ट रोजी तयार करून ठेवली आहे. (३१)

يٰنِسَآءَ النَّبِيِّ لَسْتُنَّ كَاَحَدٍ مِّنَ النِّسَآءِ اِنِ اتَّقَيْتُنَّ فَلَا تَخْضَعْنَ بِالْقَوْلِ فَيَطْمَعَ الَّذِيْ فِيْ قَلْبِهٖ مَرَضٌ وَّقُلْنَ قَوْلًا مَّعْرُوْفًا ﴿٣٢﴾

अहो पैगंबरांच्या पत्न्यांनो! तुम्ही सामान्य स्त्रियांसारख्या नाहीत; [२] जर तुम्ही (अल्लाहला) भीत असाल, तर तुम्ही कोमल आवाजात बोलू नका; की, ज्याच्या मनांत रोग असेल, तो काही विचार करेल; [३] हां! वाजवी रीतीने (च) बोला [४] (३२)

وَقَرْنَ فِيْ بُيُوْتِكُنَّ وَلَا تَبَرَّجْنَ تَبَرُّجَ الْجَاهِلِيَّةِ الْاُوْلٰى وَاَقِمْنَ الصَّلٰوةَ وَاٰتِيْنَ الزَّكٰوةَ وَاَطِعْنَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ ۭ اِنَّمَا يُرِيْدُ اللّٰهُ لِيُذْهِبَ عَنْكُمُ الرِّجْسَ اَهْلَ الْبَيْتِ وَيُطَهِّرَكُمْ تَطْهِيْرًا ﴿٣٣﴾

आणि आपल्यांच घरांत जमून असा. [५] आणि जुन्या अज्ञानपणाच्या काळाप्रमाणे, आपल्या शृंगाराला जाहीर करू नका. [६] आणि नमाज पढत रहा, आणि जकात देत रहा; आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करा. [७] अल्लाहतआला हेच इच्छितो की, हे पैगंबरांच्या घरवाल्यांनो! [८] तुमच्यापासून (प्रत्येक प्रकारची) निरर्थक गोष्ट, त्याने दूर करून घ्यावी. आणि तुम्हांस खूप पाक साफ करून द्यावे. (३३)

وَاذْكُرْنَ مَا يُتْلٰى فِيْ بُيُوْتِكُنَّ مِنْ اٰيٰتِ اللّٰهِ وَالْحِكْمَةِ ۭ اِنَّ اللّٰهَ كَانَ لَطِيْفًا خَبِيْرًا ﴿٣٤﴾

तुमच्या घरांत अल्लाहची जी महावाक्ये, आणि पैगंबरांच्या (सल्ल.) ज्या हदीशीं, वांचल्या जातात, त्याचे पठण करत रहा. [९] खचितच अल्लाहतआला नरमी करणारा आणि माहितगार आहे. (३४)

اِنَّ الْمُسْلِمِيْنَ وَالْمُسْلِمٰتِ وَالْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ وَالْقٰنِتِيْنَ وَالْقٰنِتٰتِ وَالصّٰدِقِيْنَ وَالصّٰدِقٰتِ وَالصّٰبِرِيْنَ وَالصّٰبِرٰتِ وَالْخٰشِعِيْنَ وَالْخٰشِعٰتِ وَالْمُتَصَدِّقِيْنَ وَالْمُتَصَدِّقٰتِ وَالصَّاۗىِٕمِيْنَ وَالصّٰۗىِٕمٰتِ وَالْحٰفِظِيْنَ فُرُوْجَهُمْ وَالْحٰفِظٰتِ وَالذّٰكِرِيْنَ اللّٰهَ كَثِيْرًا وَّالذّٰكِرٰتِ ۙ اَعَدَّ اللّٰهُ لَهُمْ مَّغْفِرَةً وَّاَجْرًا عَظِيْمًا ﴿٣٥﴾

नि:संशय, मुसलमान पुरूष आणि मुसलमान स्त्रियां, [१०] ईमानवाले पुरुष, आणि ईमानवाल्या स्त्रियांआज्ञापालन करणारे पुरूष आणि आज्ञाधारक स्त्रिया, सत्यवादी पुरूष आणि सत्यवादी स्त्रियां, सहनशिल पुरूष आणि सहनशिल स्त्रियां, विनयशील पुरूष, आणि विनयशील स्त्रियां, दानधर्म करणारे पुरूष, आणि दानधर्म करणाऱ्या स्त्रियां, उपास ठेवणारे पुरूष आणि उपास ठेवणाऱ्या स्त्रियांआपली लाज सांभाळणारे पुरूष आणि (लाज) सांभाळणाऱ्या स्त्रियां, अल्लाहतआलाचे भरपूर नामस्मरण करणारे, आणि नामस्मरण करणाऱ्या, या (सर्वांसाठी) अल्लाहतआलाने, विस्तृत क्षमा, आणि (मोठा) मोबदला तयार करून ठेवला आहे. (३५)

१) म्हणजे ज्याप्रमाणे गुन्ह्याची शिक्षा दुप्पट होईल, पुण्याचा मोबदला पण दुप्पट होईल. नबी ﷺ ला, अल्लाहतआलाने फर्माविले, ''मग तर आम्ही सुद्धा आपणास दुप्पट शिक्षा इहलोकाची, आणि दुप्पटच मृत्युची, शिक्षा करतो.'' (सू.बनी इस्राईल-७५)

२) म्हणजे तुमची स्थिती आणि (प्रतिष्ठा) मर्तबा, सर्व साधारण स्त्रियांसारखा नाही. किंबहुना अल्लाहने तुम्हांस, रसूलुल्लाहु ﷺ च्या पत्नी होण्याचा बहुमान बहाल केला आहे. याच्यामुळे तुम्हास एक विशेष स्थान प्राप्त आहे. आणि पैगंबराप्रमाणे तुम्ही सुद्धा, उम्मतसाठी एक नमुना बनावयाचे आहे. म्हणून त्यांना, यांच्या स्थान आणि मर्तब्याने सूचित करून, त्यांना काही सूचना देण्यांत येत आहेत. याला संबोधित जरी पवित्र पत्न्या असल्या, ज्यांना ईमानवाल्यांच्या आई ठरविण्यांत आले आहे, परंतु वर्णन करण्याच्या शैलीने स्पष्ट जाहीर आहे की, उद्देश्य पूर्ण उम्मते मुस्लीमाच्या स्त्रियांना समजावणे आणि सावध करणे आहे. म्हणून या सूचना समस्त मुसलमान स्त्रियांसाठी आहेत.

३) अल्लाहतआलाने ज्या प्रमाणे स्त्रीमध्ये, पुरूषासाठी लैगिंक आकर्षण ठेविले आहे. (ज्याच्या संरक्षणाकरीता विशेष सूचना दिल्या गेल्या आहेत, कारणकी, स्त्रीने पुरूषाकरीतां फिसादाला कारणीभूत होऊ नये) अशाच प्रकारे अल्लाहतआलाने स्त्रियांच्या आवाजात सुद्धा, नैसर्गिकरित्या मनाला मोहित करणे, विनय शिलता, आणि नाजुकपणा ठेवला आहे. जी पुरूषाला आपल्याकडे खेचते. म्हणूनच ह्या आवाजासाठी पण सूचना देण्यांत आली की, पुरूषांशी संभाषण करतांना जाणून बुजून असा बोलण्याचा ढंग अंगीकार करा, की विनयशिलता आणि नाजुकतेच्या जागी, थोडीशी सक्ती आणि कोरडेपणा असावा; यासाठी की, कोणी वाईट मनाचा, बोलण्याच्या विनयशिलतेने

तुमच्याकडे आकर्षीत न व्हावा; आणि त्याच्या मनांत वाईट विचार निर्माण न व्हावा.
४) म्हणजे हा रुक्षपणा फक्त बोलण्याच्या ढंगापुरताच असावा, तोंडाने असा शब्द कांढू नये, जो नेहमीचा रिवाज आणि चारित्र्याच्या विरूद्ध असावा. ''इनित् तकय्तुन्न'' ने म्हणून, इशारा करून दिला की, ही गोष्ट आणि दुसऱ्या सूचना, ज्या पुढे येत आहेत, अल्लाहला भिणाऱ्या स्त्रियांकरीता आहेत. कारण की, त्यांनाच ही काळजी असते कि त्यांचा परलोक कोठे बर्बाद न होऊन जावा. ज्यांची अंत:करणे अल्लाहच्या भयाने खाली आहेत. त्यांचा या सूचनांशी काय संबंध? आणि त्या केव्हां या सूचनांची पर्वा करतात?
५) म्हणजे टिकून रहा. आणि अनावश्यक गरजांसाठी, घराच्या बाहेर निघू नका. याच्यात खुलासा करून देण्यात आला की, स्त्रीच्या कर्तृत्वाचे क्षेत्र, राजकारणाची कामे, आणि देशाचे नेतृत्व, रोजी कमविण्याचे झमेले पण नाही. किंबहुना घराच्या चार भिंतीच्या आंत राहून, घरगुती कामे, पार पाडणे आहे.
६) याच्यांत घरातून बाहेर पडण्याची पद्धत दाखवून दिली. की जर बाहेर जाण्याची आवश्यकताच भासली, तर बनाव शृंगार करून, किंवा अशा पद्धतीने, ज्यामुळे तुमचा बनाव शृंगार जाहीर व्हावा, असे बाहेर निघूं नका. जसे बेपर्दा होऊन, ज्यामुळे तुमचे डोके, चेहरा, हात आणि छाती वगैरे, लोकांना बघण्याचे आवाहन देईल. किंबहुना सुगंध लावल्याशिवाय, साधारण पोषाख परिधान करून परद्यासह बाहेर निघा. 'तब्बरूज' पर्द्याशिवाय, बनाव शृंगाराला जाहीर करण्याला म्हणतात. कुरआनाने स्पष्ट करून दिले आहे की, हा 'तब्बरूज' अडाणीपणा आहे. जो इस्लामच्या पूर्वी होता. आणि भविष्यात देखील सुगंध जेव्हाकधी त्याला अंगीकारले जाईल, ही जहालतच (अडाणी पणा) होईल. इस्लामचा याच्याशी काहीही संबंध नाही. जरी याचे नांव कितीही सुंदर, मनाला मोहविणारे, ठेऊन दिले जावे.
७) या मागच्या सूचना, वाईटापासून वांचण्याच्या संबंधीत होत्या. या सूचना आता, सदाचरणाला अंगीकारण्याच्या बाबतीत आहेत.
८) 'अहले बैत' ने कोण अपेक्षित आहे? याच्या बाबतीत काही मतभेद आहेत. काहींनी पवित्र पत्न्यांना गृहीत धरले आहे. जसे की, येथे कुरआन करीमच्या संदर्भावरून स्पष्ट आहे. कुरआन करीमने येथे, पवित्र पत्न्यांनाच, 'अहले बैत' म्हटले आहे. कुरआनाच्या दुसऱ्या जागी सुद्धा पत्नीला अहले बैत म्हणण्यांत आले आहे. उदाहरणार्थ सू.हूद आ.७३ मध्ये म्हणजे पवित्र पत्न्यांचे अहले बैत होणे, कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याने, स्पष्ट आहे. काही लोक काही रिवायतींच्या अनुषंगाने, 'अहले बैत' ला योग्य फक्त, ह.अली, ह.फातमा, ह.हसन व हुसेनला (रजी. अल्लाह अनहुम अजमईन) मानतात. आणि पवित्र पत्न्यांना यापासून निष्कासित समझतात; जेव्हा की प्रथम उल्लेख केलेल्या, या चार सहाबांना, यापासून (अहले बैत पासून) निष्कासित समजतात. तथापि मध्यम मार्ग हा आहे की, दोन्हीही अहलेबैत आहेत. पवित्र पत्न्या तर या कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याने, आणि जांवई आणि संतती या रियायतीच्या अनुषंगाने ज्या सही सनदीने सिद्ध आहेत; ज्यांत नबी ﷺ नी, त्यांना आपल्या चादरीत घेऊन सांगितले की, हे अल्लाह! हे माझे अहले बैत आहेत. ज्याचा अर्थ हा आहे की, हे पण माझ्या अहले बैत पासून आहेत. किंवा ही दुआ आहे की, हे अल्लाह! यांना सुद्धा, पवित्र पत्न्यांसारखे माझ्या अहले बैत मध्ये शामील करून दे! अशा प्रकारे सर्व प्रमाणांमध्ये सुद्धां एकमेकांना आधार देतात. (आणखी तपशीलासाठी पहावे फत्हुल कदीर)
९) म्हणजे यांच्यावर अंमलबजावणी करा. 'हिकमत' ने अभिप्रेत हदीशी आहेत. या महावाक्याने आधार घेत, काही धर्मपंडीतांनी (उल्मा) म्हटले आहे की, हदीसपण कुरआनाप्रमाणे 'वह्यमतलू' आहे. याशिवाय हे महावाक्य सुद्धा पवित्र पत्न्यांच्या, अहले बैत होण्यावर प्रमाण आहे.यासाठी की वह्य चे अवतरण, ज्याचा उल्लेख या महावाक्यात आहे, पवित्र पत्न्यांच्या घरातच होत असे. विशेषत: ह.आयेशा ﵂ च्या घरात जसे की हदीशींमध्ये आहे.
१०) हजरत उम्मे सल्मा ﵂ आणि काही दुसऱ्या सहाबियातने, म्हटले की, काय गोष्ट आहे, अल्लाहतआला प्रत्येक ठिकाणी पुरूषांनाच संबोधित करतो, स्त्रियांना नाही. ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले. (मुसनद अहमद, ३०१/६, तिर्मिझी क्र.३२११) याच्यात स्त्रियांची मने राखण्याची व्यवस्था केली आहे. नाही तर सर्व आदेशांमध्ये, पुरूषांच्या बरोबर स्त्रियांपण शामील आहेत. शिवाय त्या खास आदेशांच्या, जे फक्त स्त्रियांसाठीच आहेत. हे महावाक्य आणि दुसऱ्या महावाक्यांनी, स्पष्ट आहे की उपासना आणि अल्लाहचे आज्ञापालन, आणि पारलौकिक दर्जे, आणि श्रेष्ठत्वामध्ये, पुरूष आणि स्त्रीयांच्या दर्म्यान काही फरक नाही. दोघांसाठी समान पद्धतीने हे क्षेत्र खुले आहे. आणि दोघे जास्तीत जास्त पुण्य, आणि मोबदला व प्रतिफळ, कमवूंशकतात. लिंगाच्या आधारावर याच्यात कमी जास्त केले जाणार नाही. याशिवाय मुसलमान आणि ईमानवाल्यांचा वेगवेगळा उल्लेख करण्याने, स्पष्ट आहे की या दोघांत फरक आहे. ईमानचा दर्जा इस्लामहून वाढून आहे. जसे की, कुरआन व हदीसच्या दुसऱ्याप्रमाणे सुद्धा, यावर प्रामाण्य करतात.

وَمَا كَانَ لِمُؤْمِنٍ وَّلَا مُؤْمِنَةٍ اِذَا قَضَى اللّٰهُ وَرَسُوْلُهٗۤ اَمْرًا اَنْ يَّكُوْنَ لَهُمُ الْخِيَرَةُ مِنْ اَمْرِهِمْ ؕ وَمَنْ يَّعْصِ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ فَقَدْ ضَلَّ ضَلٰلًا مُّبِيْنًا ﴿٣٦﴾

**आणि कोण्या मुसलमान पुरूष व स्त्रीला, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञेनंतर, आपल्या कोण्या गोष्टीचा काही अधिकार बाकी राहत नाही. [१] (लक्षांत ठेवा) अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा जो आज्ञाभंग करेल तर तो धडधडीत चुकीत पडून बहकला. ३६**

وَاِذْ تَقُوْلُ لِلَّذِیْۤ اَنْعَمَ اللّٰهُ عَلَيْهِ وَاَنْعَمْتَ عَلَيْهِ اَمْسِكْ عَلَيْكَ زَوْجَكَ وَاتَّقِ اللّٰهَ وَتُخْفِیْ فِیْ نَفْسِكَ مَا اللّٰهُ مُبْدِيْهِ وَتَخْشَى النَّاسَ ۚ وَاللّٰهُ اَحَقُّ اَنْ تَخْشٰىهُ ؕ فَلَمَّا قَضٰى زَيْدٌ مِّنْهَا وَطَرًا زَوَّجْنٰكَهَا لِكَیْ لَا يَكُوْنَ عَلَى الْمُؤْمِنِيْنَ حَرَجٌ فِیْۤ اَزْوَاجِ اَدْعِيَآئِهِمْ اِذَا قَضَوْا مِنْهُنَّ وَطَرًا ؕ وَكَانَ اَمْرُ اللّٰهِ مَفْعُوْلًا ﴿٣٧﴾

**जेव्हा की, तू त्या माणसाला सांगत होता, ज्यावर अल्लाहने पण कृपा केली, आणि तू सुद्धा की, तू आपल्या बायकोला (पत्नीत्वात) बाकी ठेव, आणि अल्लाहला भी. आणि तू आपल्या मनात ती गोष्ट लपवित होतास, जिला अल्लाहतआला जाहीर करणार होता; आणि तू लोकांना भित होतास; अल्लाहतआला याचा जास्त हक्कदार होता की, तू त्याला भ्यावेस. [२] मग जेव्हा जैदने, त्या स्त्रीकडून आपला हितसंबध सोडून दिला. [३] आम्ही तिला तुझ्या विवाह बंधनात, देऊन दिले. [४] कारण की, मुसलमानांवर, आपल्या दत्तक मुलांच्या पत्नीच्या बाबतीत, कोण्या प्रकारची अडचण राहू नये; जेव्हा की, ते आपला हितसंबंध त्यांच्याशी सोडून देतील. [५] आणि अल्लाहचा (हा) हुकूम तर पूर्ण होऊन रहावयाचाच होता. [६] ३७**

مَا كَانَ عَلَى النَّبِیِّ مِنْ حَرَجٍ فِيْمَا فَرَضَ اللّٰهُ لَهٗ ؕ سُنَّةَ اللّٰهِ فِی الَّذِيْنَ خَلَوْا مِنْ قَبْلُ ؕ وَكَانَ اَمْرُ اللّٰهِ قَدَرًا مَّقْدُوْرَا ﴿٣٨﴾

**ज्या गोष्टी अल्लाहतआलाने आपल्या पैगंबरीसाठी विहीत (हलाल) केल्या आहेत, त्यांच्या करण्यात पैगंबरास काही हरकत नाही; [७] हाच अल्लाहचा दस्तुर यांच्यात राहिला, जे पूर्वी होऊन गेलेत; [८] अल्लाहतआलाची कामे पूर्व संकल्पावर ठरलेली आहेत [९] ३८**

اِلَّذِيْنَ يُبَلِّغُوْنَ رِسٰلٰتِ اللّٰهِ وَيَخْشَوْنَهٗ وَلَا يَخْشَوْنَ اَحَدًا اِلَّا اللّٰهَ ؕ وَكَفٰى بِاللّٰهِ حَسِيْبًا ﴿٣٩﴾

**हे सर्व असे होते की, अल्लाहतआलाचे आदेश पोहचवित रहात असत. आणि अल्लाहलाच भित असत; आणि अल्लाहशिवाय कोणालाच भित नसत; [१०] आणि अल्लाहतआला, हिशेब घेण्यास पुरेसा आहे. [११] ३९**

مَا كَانَ مُحَمَّدٌ اَبَاۤ اَحَدٍ مِّنْ رِّجَالِكُمْ وَلٰكِنْ رَّسُوْلَ اللّٰهِ وَخَاتَمَ النَّبِيّٖنَ ؕ وَكَانَ اللّٰهُ بِكُلِّ شَیْءٍ عَلِيْمًا ﴿٤٠﴾

**तुमच्या पुरूषांमधून कोणाचे वडील, मोहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) नाहीत; [१२] परंतु आपण (सल्ल.) अल्लाहतआलाचे पैगंबर आहेत. आणि सर्व पैगंबरात अंतिम पैगंबर आहेत; [१३] आणि अल्लाहतआला प्रत्येक वस्तुंशी, चांगल्या प्रकारे वाकब आहे. ४०**

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اذْكُرُوا اللّٰهَ ذِكْرًا كَثِيْرًا ﴿٤١﴾

**मुसलमानांनो! अल्लाहतअलाचे अतोनात स्मरण करीत जा. ४१**

१) हे महावाक्य ह.जैनब ﵂ च्या लग्नासंबंधात अवतीर्ण झाले होते. ह.जैद बिन हारिसा ﵁, जे मुळांत जरी अरब होते, परंतु कोणी तरी त्यांना लहानपणी जबरदस्तीने पकडून, गुलाम म्हणून विकून टाकले होते. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमशी, ह.खदिजा ﵂ च्या लग्नानंतर, ह.खदिजा ﵂ ने त्यांना, रसूलुल्लाह् ﷺ ला देऊन टाकले होते. आपण ﷺ नी त्यांना स्वतंत्र करून, आपला (दत्तक) मुलगा बनवून घेतले होते. नबी ﷺ नी, त्यांच्या लग्नाकरीतां, आपली आते बहीण, ह.जैनब ﵂ ला लग्नाचा संदेश पाठविला; ज्यावर त्यांना आणि त्यांच्या भावाला, वंश श्रेष्ठत्वाच्या कारणाने, संकोच वाटला की, जैद हा एक स्वतंत्र केलेला गुलाम आहे, आणि आमचा संबंध एका उंच घराण्यांशी आहे. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. ज्याचा अर्थ हा आहे की, अल्लाह व रसूलच्या निर्णयानंतर, कोण्या ईमानवाल्या पुरुष आणि स्त्रीला, हा हक्क प्राप्त नाही की, त्यांनी आपला अधिकार अंमलात आणावा. किंबहुना त्याच्या करता आवश्यक आहे की, त्यांनी अल्लाह व रसूलच्या निर्णयाला मान्य करून घ्यावे म्हणून हे महावाक्य ऐकल्यानंतर, ह.जैनब ﵂ वगैरेंनी, आपल्या मतावर हट्ट धरला नाही, आणि त्यांचे आपसांत लग्न होऊन गेले.

२) कारण की, त्यांच्या स्वभावांत भिन्नता होती, पत्नीच्या स्वभावांत घराण्याचे मोठेपण आणि श्रेष्ठता भरलेली होती, जेव्हांकी, जैदला गुलामीचा डाग लागलेला होता. त्यांची आपसांत अन्बन् असावयाची. ज्याची चर्चा ह.जैद ﵁ नबी ﷺ शी नेहमी करीत असत. आणि तलाक देण्याचा इरादा पण जाहीर करीत. परंतु नबी ﷺ त्यांना तलाक देण्यापासून मना करीत, आणि निभवून घेण्याचा उपदेश करीत. याशिवाय अल्लाहतआलाने आपणांस ﷺ भविष्यांत घडणाऱ्या

या गोष्टीपासून सूचित करून दिले होते की, जैदकडून तलाक दिला जाईल आणि त्याच्यानंतर जैनबचे लग्न आपल्याशी करून दिले जाईल. कारण की अज्ञान काळाच्या या चुकीच्या रिवाजावर एक जबरदस्त हल्ला करून, हे स्पष्ट करून देण्यात यावे की, दत्तक मुलगा, धर्मशास्त्राच्या आदेशांत वास्तविक मुला सारखा नाही. आणि त्याने तलाक दिलेल्या स्त्रीशी, लग्न करणे योग्य (जाएज) आहे. या महावाक्यामध्ये, याच गोष्टीकडे इशारा केला गेला आहे. ह.जैद वर अल्लाहची कृपा ही होती की, त्यांना इस्लाम कबूल करण्याची सुबुद्धी दिली. आणि गुलामीतून सुटका करून दिली. नबी ﷺ चा, उपकार, त्यांच्यावर हा होता की, त्यांचे धार्मिक प्रशिक्षण केले, त्यांना स्वतंत्र करून, आपला मुलगा बनवून घेतले. आणि आपली आत्या, उमैमा बिन्ते अबदुल मुत्तलिब च्या मुलीशी त्यांचे लग्न करून दिले. मनांत लपविण्याची गोष्ट हीच होती. जी आपल्याला ह.जैनबशी लग्नाच्या बाबतीत, वह्यीमार्फत सांगण्यात आली होती. आपण ﷺ या गोष्टीला भित होते की, लोक म्हणतील, आपल्या सुनेशी लग्न करून घेतले. वास्तविक जेव्हा अल्लाहला, आपल्या मार्फत या रिवाजाला संपवून टाकावयाचे होते, तर मग लोकांशी भिण्याचे काही कारण नव्हते. आपले भय जरी स्वाभाविक होते, असे असून सुद्धांआपल्याला तंबी देण्यात आली. जाहीर करण्याने अभिप्रेत हेच आहे की, हे लग्न होईल, ज्यामुळे ही गोष्ट, सर्वांच्या लक्षात येऊन जाईल.

३) म्हणजे लग्नानंतर तलाक दिला, आणि ह.जैनब ؓ इद्दतीतून मुक्त होऊन गेली.

४) म्हणजे हे लग्न, नेहमीच्या पद्धतीपेक्षा उलट फक्त अल्लाहच्या हुकुमाने ठरविले गेले; म्हणजे निकाहखानी, वली शिवाय, मेहेर (स्त्रीधना) चा हक्क, आणि साक्षीदारांशिवायच पार पडले.

५) हे ह.जैनबशी, नबी ﷺ च्या लग्नाचे कारण आहे की, भविष्यांत कोण्या मुसलमानाला, या बाबतीत अडचण वाटू नये, आणि आवश्यकतेनुसार आणि आपल्या मर्जीनुसार दत्तक मुलाच्या तलाक दिलेल्या पत्नीशी, लग्न केले जाऊ शकावे.

६) म्हणजे पूर्वीच अल्लाहतआलाने ठरविले होते, जे कुठल्याही प्रकारे होऊन रहावयाचेच होते.

७) हा याच, ह.जैनबच्या लग्नाच्या घटनेकडे इशारा आहे, कारण की लग्न आपल्या ﷺ साठी विहीत (हलाल) होते, म्हणून यांच्यात काही पाप आणि संकोच वाटण्याची गोष्ट नाही.

८) म्हणजे मागील पैगंबर सुद्धा, अशी कामे करण्यास काही हरकत समजत नव्हते. जे अल्लाहकडून त्यांच्यावर कर्तव्य (फर्ज) म्हणून ठरविले जात असत. सामाजिक आणि जनतेचे रीती रिवाज, त्यांच्या विरूद्धच का असोत.

९) म्हणजे खास प्रयोजनावर आधारित असतात. ऐहिक सत्ताधिशांप्रमाणे वेळेनुसार आणि तात्पुरत्या आवश्यकतेवर लागू होत नसत. अशाच प्रकारे त्यांचा समय पण निश्चित असतो, ज्याप्रमाणे ते घडून येतात.

१०) म्हणून कोणाची भीती किंवा दबदबा, त्यांना अल्लाहचा संदेश पोहचविण्यांत, अडथळा बनत नव्हता. तसेच त्यांना न कोणाच्या टिकेची आणि निंदेची, पर्वा असे.

११) म्हणजे प्रत्येक ठिकाणी तो आपल्या ज्ञान आणि सामर्थ्याने हजर आहे. म्हणून तो आपल्या सेवकांना मदतीसाठी पुरेसा आहे. आणि अल्लाहच्या धर्माचा प्रचार आणि आवाहनमध्ये त्यांना ज्या अडचणी येतात, यांच्यात तो त्यांची मदत करतो; आणि शत्रूंच्या वाईट इरादे आणि कारस्थानांपासून त्यांना वांचवितो.

१२) म्हणून ते, जैद बिन हारिसाचे पण वडील नाहीत, ज्यावर त्यांना टिकेचे लक्ष्य केले जाऊ शकावे, की त्यांनी आपल्या सुनेशी लग्न कसे काय करून घेतले? किंबहुना एक जैदच काय, ते तर कोणाही पुरूषाचे बाप नाहीत. कारण जैद तर हारिसाचे पुत्र होते, आपण तर त्यांना दत्तक मुलगा बनविले होते, आणि अज्ञान काळाच्या दस्तुराप्रमाणे, त्यांना जैद बिन मुहम्मद म्हणण्यांत येत असे. वास्तविक ते आपले ﷺ सख्खे पुत्र नव्हते. याच करितां, ''उद्‌ऊ हुम् लि आबा इहिम्'' च्या अवतरणानंतर, त्यांना जैद बिन हारेसाच म्हणण्यात येत होते, याशिवाय ह.खदिजा ؓ पासून आपणास ﷺ तीन मुलगे, कासिम, ताहिर, तैय्यब झालेत; आणि इब्राहीम हा मुलगा, मारिया किब्तिया पासून झाला. परंतु हे सर्वच्या सर्व लहानपणीच वारले. यांच्यातून कोणीही तरूण वयापर्यंत पोहचला नाही. तसेच आपल्या ﷺ सख्ख्या संततीमधून सुद्धा कोणी पुरूष झाला नाही की, आपण ﷺ बाप असते. (इब्ने कसीर)

१३) 'खातम' मोहोरला म्हणतात; आणि मोहोर शेवटच्या कृत्यालाच म्हटले जाते. म्हणजे आपल्यावर ﷺ वर पैगंबरीचा शेवट करून दिला गेला; आपल्या ﷺ नंतर जो पण पैगंबरीचा दावा करील, तो पैगंबर नाही, लबाड आणि दज्जाल असेल. हदीसींमध्ये या विषयाला विस्ताराने वर्णन करण्यांत आले आहे. आणि यावर संपूर्ण उम्मतीची एकवाक्यता आहे. कयामतच्या जवळ, ह.ईसा عليه السلام चे अवतरण होईल; जे खऱ्या क्रमश: हदीसींनी सिद्ध आहे. तर ते पैगंबर म्हणून येणार नाहीत; किंबहुना नबी ﷺ चे उम्मती बनून येतील. म्हणून त्यांचे अवतरण पैगंबरीचा शेवट होण्याच्या धारणेच्या विरूद्ध नाही.

| | |
|---|---|
| आणि सकाळ संध्याकाळ त्याचे पावित्र्य वर्णन करीत जा ४२ | وَّسَبِّحُوْهُ بُكْرَةً وَّاَصِيْلًا ﴿٤٢﴾ |
| जो तुमच्यावर आपल्या दया पाठवितो; आणि त्याचे देवदूत, (तुमच्यासाठी दयेची प्रार्थना करतात) तो तुम्हास अंध:कारांतून काढून, प्रकाशाकडे घेऊन जातो. अल्लाहतआला मुसलमानांवर फारच दयाळू आहे. ४३ | هُوَ الَّذِيْ يُصَلِّيْ عَلَيْكُمْ وَمَلٰٓئِكَتُهٗ لِيُخْرِجَكُمْ مِّنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوْرِ ۭ وَكَانَ بِالْمُؤْمِنِيْنَ رَحِيْمًا ﴿٤٣﴾ |
| ज्या दिवशी हे (अल्लाहला) भेटतील, त्यांना भेट 'सलाम' राहील. [१] त्यांच्या करितांअल्लाहतआलाने फार मोठा मोबदला तयार करून ठेवला आहे. ४४ | تَحِيَّتُهُمْ يَوْمَ يَلْقَوْنَهٗ سَلٰمٌ ښ وَاَعَدَّ لَهُمْ اَجْرًا كَرِيْمًا ﴿٤٤﴾ |
| हे पैगंबरा! खचित्‌च आम्ही आपणांस पैगंबर बनवूनच पाठविले आहे. साक्ष[२] देणारा, शुभवर्तमान ऐकविणारा, सावध करणारा; ४५ | يٰٓاَيُّهَا النَّبِيُّ اِنَّآ اَرْسَلْنٰكَ شَاهِدًا وَّمُبَشِّرًا وَّنَذِيْرًا ﴿٤٥﴾ |
| आणि अल्लाहच्या हुकुमाने, त्याच्याकडे बोलविणारा, आणि प्रकाशित दिवा[३] ४६ | وَّدَاعِيًا اِلَى اللّٰهِ بِاِذْنِهٖ وَسِرَاجًا مُّنِيْرًا ﴿٤٦﴾ |
| आपण ईमानवाल्यांना खुषखबर ऐकवून द्या की, त्यांच्या करितांअल्लाह कडून फार मोठी कृपा आहे. ४७ | وَبَشِّرِ الْمُؤْمِنِيْنَ بِاَنَّ لَهُمْ مِّنَ اللّٰهِ فَضْلًا كَبِيْرًا ﴿٤٧﴾ |
| आणि काफिरांचे आणि दांभिकांचे म्हणणे मानू नका! आणि जी इजा (त्यांच्याकडून पोहचेल) तिचा विचार सुद्धा करू नका; अल्लाहवर भरोसा करून रहा. आणि अल्लाहतआला काम बनवून देण्यास पुरेसा आहे. ४८ | وَلَا تُطِعِ الْكٰفِرِيْنَ وَالْمُنٰفِقِيْنَ وَدَعْ اَذٰىهُمْ وَتَوَكَّلْ عَلَى اللّٰهِ ۭ وَكَفٰى بِاللّٰهِ وَكِيْلًا ﴿٤٨﴾ |
| अहो मोमिनांनो! जेव्हा तुम्ही मोमिन स्त्रियांशी लग्न कराल, मग हात लावण्यापूर्वीच तलाक देऊन द्याल, तर त्यांच्यावर तुमचा कोणताही इद्दतचा हक्क नाही, ज्याला तुम्ही मोजाल. [४] तुम्हास काही न काही त्यांना देऊन दिले पाहिजे. [५] आणि चांगल्या रीतीने त्यांना निरोप दिला पाहिजे. [६] ४९ | يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِذَا نَكَحْتُمُ الْمُؤْمِنٰتِ ثُمَّ طَلَّقْتُمُوْهُنَّ مِنْ قَبْلِ اَنْ تَمَسُّوْهُنَّ فَمَا لَكُمْ عَلَيْهِنَّ مِنْ عِدَّةٍ تَعْتَدُّوْنَهَا ۚ فَمَتِّعُوْهُنَّ وَسَرِّحُوْهُنَّ سَرَاحًا جَمِيْلًا ﴿٤٩﴾ |

१) म्हणजे स्वर्गांत देवदूत ईमानवाल्यांना, किंवा ईमानवाले आपसात एक दुसऱ्याला सलाम करतील.

२) काही लोक 'शाहिद' चा अर्थ हजर आणि पहाणाऱ्याचा करतात, जो कुरआनाच्या अर्थांत फेरबदल आहे. नबी ﷺ, आपल्या उम्मतीची साक्ष देतील, त्यांची पण ज्यांनी आपल्या ﷺ वर ईमान आणले, आणि त्यांची पण ज्यांनी आपल्याला ﷺ खोटे ठरवले. आपण कयामतच्या दिवशी, ईमानवाल्यांना, त्यांच्या वजूच्या अवयवांवरून ओळखून घेतील, जे चमकत असतील. अशाचप्रकारे आपण दुसऱ्या पैगंबरांची पण साक्ष देतील की त्यांनी आपआपल्या लोकांना, अल्लाहचा संदेश पोहचवून दिला होता. आणि ही साक्ष, अल्लाहने दिलेल्या निश्चित ज्ञानाच्या आधारावर होईल. यासाठी नाही की, आपण सर्व पैगंबरांना डोळ्यांनी पहात राहिलो आहोत. ही श्रद्धा तर कुरआनाच्या स्पष्ट महावाक्यांच्या (नूसूस) विरूद्ध आहे.

३) ज्याप्रमाणे दिव्याने अंध:कार दूर होऊन जातात, अशाच प्रकारे आपल्या ﷺ मार्फत, कुफ्र आणि शिर्कचे अंध:कार दूर झालेत. याशिवाय या दिव्याला, प्रकाशित करून जो कमाल आणि सद्भाग्य प्राप्त करू इच्छील, तो करू शकतो. यासाठी की हा दिवा कयामतपर्यंत प्रज्वलीत आहे.

४) लग्नानंतर ज्या स्त्रियांशी शय्यासोबत केली जाऊन चुकली असेल आणि ती अजुन तरूण असेल, अशा स्त्रियांना तलाक मिळाला असेल तर त्यांची इद्दत तीन ऋतुस्राव (मासिक पाळ्या) आहे. (सू.बकर:२२८) येथे त्या स्त्रियांचा हुकूम सांगण्यात येत आहे ज्यांचे लग्न झाले आहे, परंतु पती पत्नीत शय्यासोबत झाली नाही, अशा स्त्रीयांचा जर तलाक होऊन जाईल, तर काही इद्दत नाही; म्हणजे अशी संभोग न झालेली, तलाक मिळालेली इद्दत पार पाडल्याशिवाय लगेच कोठे लग्न करू इच्छील तर करू शकते. तथापि जर शय्यासोबती पूर्वी, पती मरून जाईल तर मग तिला ४ महिने १० दिवसच इद्दत पार करावी लागेल. (फत्हुल कदीर, इब्ने कसीर) स्पर्श करणे किंवा हात लावणे हा इशारा आहे संभोगाकडे. निकाहचा शब्द खास संभोग आणि लग्नबंधन दोहोंसाठी उपयोगात आणला जातो. येथे लग्नाच्या अर्थांत आहे.

५) मताए, तलाक दिलेल्या स्त्रीला तिचा मान राखण्यासाठी दिली जाणारी मालमत्ता म्हणजे मताए मारूफ जर मेहेर नक्की केली असेल तिच्या अर्धी, नाहीतर आपल्या बुद्धीने काही देऊन दिले जावे.

६) म्हणजे त्यांना आदर सन्मानाने, कुठलाही त्रास दिल्या शिवाय, वेगळे करून देण्यात यावे.

يٰۤاَيُّهَا النَّبِيُّ اِنَّاۤ اَحۡلَلۡنَا لَكَ اَزۡوَاجَكَ الّٰتِيۡۤ اٰتَيۡتَ اُجُوۡرَهُنَّ
وَمَا مَلَكَتۡ يَمِيۡنُكَ مِمَّاۤ اَفَآءَ اللّٰهُ عَلَيۡكَ وَبَنٰتِ عَمِّكَ وَبَنٰتِ
عَمّٰتِكَ وَبَنٰتِ خَالِكَ وَبَنٰتِ خٰلٰتِكَ الّٰتِيۡ هَاجَرۡنَ مَعَكَ
وَامۡرَاَةً مُّؤۡمِنَةً اِنۡ وَّهَبَتۡ نَفۡسَهَا لِلنَّبِيِّ اِنۡ اَرَادَ النَّبِيُّ
اَنۡ يَّسۡتَـنۡكِحَهَا خَالِصَةً لَّكَ مِنۡ دُوۡنِ الۡمُؤۡمِنِيۡنَ ؕ
قَدۡ عَلِمۡنَا مَا فَرَضۡنَا عَلَيۡهِمۡ فِىۡۤ اَزۡوَاجِهِمۡ وَمَا مَلَكَتۡ
اَيۡمَانُهُمۡ لِكَيۡلَا يَكُوۡنَ عَلَيۡكَ حَرَجٌ ؕ وَكَانَ اللّٰهُ غَفُوۡرًا
رَّحِيۡمًا ﴿۵۰﴾

**हे पैगंबरा! आम्ही तुझ्याकरीतां, तुझ्या त्या पत्न्या हलाल करून दिल्या आहेत, ज्यांना तू त्यांचे मेहेर देऊन चुकला आहेस. (१) आणि त्या दासी सुद्धा, ज्या अल्लाहतआलाने गनीमत (जिहादमधील सापडलेला माल) मध्ये, तुला दिल्या आहेत. (२) आणि तुझ्या काकाच्या मुली, आणि आत्त्यांच्या कन्या, आणि तुझ्या मामांच्या मुली, आणि तुझ्या मावश्यांच्या मुली सुद्धा ज्यांनी तुझ्याबरोबर हिजरत केली आहे. (३) आणि ती ईमानवाली स्त्री, जी आपल्या जीवास पैगंबराला अर्पण करून टाकेल, हे या अटीवर की, स्वत: पैगंबर सुद्धा तिच्याशी लग्न करूं इच्छील; (४) हे विशेष म्हणून, फक्त तुझ्याच करतांआहे, दुसऱ्या ईमानवाल्यांसाठी नाही. (५) आम्ही याला फार चांगल्या प्रकारे जाणतो, जे आम्ही त्यांच्यावर, त्यांच्या पत्न्या आणि दाशांच्या बाबतीत, (आदेश) निश्चित करून ठेवले आहेत. (६) हे यासाठी की, तुजवर काही अडचण (बाकी) राहू नये. (७) अल्लाहतआला फारच क्षमाकर्ता आणि मोठा दयाळू आहे. (५०)**

تُرۡجِىۡ مَنۡ تَشَآءُ مِنۡهُنَّ وَتُـئْوِىۡۤ اِلَيۡكَ مَنۡ تَشَآءُ ؕ وَمَنِ
ابۡتَغَيۡتَ مِمَّنۡ عَزَلۡتَ فَلَا جُنَاحَ عَلَيۡكَ ؕ ذٰلِكَ اَدۡنٰٓى اَنۡ
تَقَرَّ اَعۡيُنُهُنَّ وَلَا يَحۡزَنَّ وَيَرۡضَيۡنَ بِمَاۤ اٰتَيۡتَهُنَّ
كُلُّهُنَّ ؕ وَاللّٰهُ يَعۡلَمُ مَا فِىۡ قُلُوۡبِكُمۡ ؕ وَكَانَ اللّٰهُ
عَلِيۡمًا حَلِيۡمًا ﴿۵۱﴾

यांच्यातून जिला तू इच्छशील, तिला अलग करून ठेव; आणि जिला इच्छशील, आपल्याजवळ ठेवून (८) घे. आणि जर तू, यांच्यातून सुद्धा कोणाला आपल्याजवळ बोलावून घेशील, ज्यांना तू वेगळे करून ठेवले होते, तर तुझ्यावर काही गुनाह नाही. (९) याच्यांत या गोष्टीची जास्त आशा आहे की, या स्त्रियांचे डोळे गार रहावेत, आणि त्यांनी खेद करू नये. आणि जे काही पण तू त्यांना देऊन देशील, यावर त्या सर्वच्या सर्वांनी समाधानी रहावे. (१०) तुमच्या मनात जे काही आहे, त्याला अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो. (११) अल्लाहतआला ज्ञानी दर्याद्र आहे. (५१)

لَا يَحِلُّ لَكَ النِّسَآءُ مِنۡۢ بَعۡدُ وَلَاۤ اَنۡ تَبَدَّلَ بِهِنَّ مِنۡ
اَزۡوَاجٍ وَّلَوۡ اَعۡجَبَكَ حُسۡنُهُنَّ اِلَّا مَا مَلَكَتۡ يَمِيۡنُكَ ؕ
وَكَانَ اللّٰهُ عَلٰى كُلِّ شَىۡءٍ رَّقِيۡبًا ﴿۵۲﴾

यांच्याशिवाय आणखी स्त्रिया आपल्यासाठी विहीत नाहीत. आणि हे पण योग्य नाही की, यांना सोडून आणखी स्त्रियांशी (लग्न करावे) जरी त्यांचे सौंदर्य (तुला) कितीका चांगले वाटेना! (१२) परंतु ज्या तुझ्या अधिन असतील. (१३) (म्हणजे दासी) आणि अल्लाहतआलाची प्रत्येक गोष्टीवर नजर आहे. (५२)

१) काही शरिअतच्या काही आदेशामध्ये, नबी ﷺ ला विशेष वेगळेपणा प्राप्त होता. ज्यांना आपण ﷺ ची वैशिष्ट्ये म्हटली जातात. उदाहरणार्थ ज्ञानवंताच्या एका समूहाच्या म्हणण्यानुसार रात्रीचे उभे राहणे (तहज्जुद) आपण ﷺ साठी फर्ज होते. दानधर्म (सदका) चा माल आपल्यावर हराम होता. अशाचप्रकारे काही वैशिष्ट्यांचा उल्लेख, कुरआन करीमच्या या ठिकाणावर, केला गेला आहे; ज्यांचा संबंध, लग्नाशी आहे. एक हे की ज्या स्त्रियांना आपण ﷺ नी मेहेर दिलेला आहे, त्या हलाल आहेत. मग ती संख्येत किती का असेना! आणि आपण ﷺ नी हजरत सफिया आणि जुवेरियाचा मेहेर, त्यांच्या स्वातंत्र्याला ठरविले होते. यांच्याशिवाय, नगदी स्वरूपात सर्वांना मेहेर अदा केला होता. फक्त उम्मे हबीबा ﵂ चा मेहेर, नज्जाशीने (यांच्यावर अल्लाहची रहमत असो) आपल्याकडून दिला होता.

२) म्हणून ह.सफिया ﵂ आणि जुवेरिया ﵂ या मिळकतीत आल्या, ज्यांना आपण ﷺ नी स्वतंत्र करून, लग्न करून घेतले. आणि रेहाना ﵂ व मारिया किब्तिया, दाशाम्हणून आपल्याजवळ राहिल्या.

३) याचा अर्थ आहे, ज्याप्रमाणे आपण ﷺ नी, हिजरत केली, अशाप्रकारे त्यांनी सुद्धा, मक्केहून मदिनेला हिजरत केली. कारण की, आपण ﷺ बरोबर कोण्या स्त्रीने सुद्धा हिजरत केली नव्हती.

४) म्हणजे स्वत: आपल्याला अर्पण करून देणारी स्त्री; जर आपण ﷺ तिच्याशी लग्न करणे पसंत करतील, तर मेहेरच्या हक्काशिवाय, आपल्या ﷺ करीतां, आपल्या विवाहबंधनात ठेवणे, योग्य (जाएज) आहे.

५) ही परवानगी फक्त आपल्या ﷺ करिता आहे. दुसऱ्या ईमानवाल्यांसाठी तर आवश्यक आहे, की त्यांनी मेहेरचा हक्क अदा करावा. तेव्हा लग्न जाएज होईल

६) म्हणजे लग्नाच्या अटी आणि हक्क आहेत, जे आम्ही फर्ज केले आहेत, उदाहरणार्थ, चारपेक्षा जास्त स्त्रिया, एकाच वेळी, कोणी मनुष्य आपल्या विवाहबंधनात ठेऊ शकत नाही. लग्नासाठी वली, साक्षीदार आणि मेहेरचा हक्क, आवश्यक आहे. तथापि दाशा, जेवढ्या कोणी इच्छील, ठेवू शकतो. तथापि, आजकाल दाशांची समस्या तर संपून गेली आहे.

७) याचा संबंध 'इन्ना अहललना' शी आहे. म्हणजे चर्चीत सर्व स्त्रियांची आपल्या ﷺ करीता जरूरी यासाठी आहे की, आपणास अडचण भासू नये. आणि आपण ﷺ यांच्यातून कोणाबरोबर लग्न करणे गुनाह समजूंनये.

८) याच्यात आपण ﷺ च्या आणखी एका वैशिष्ट्यांचे वर्णन आहे. ते हे की, पत्न्यांच्या दर्म्यान, पाळ्या निश्चित करण्यामध्ये, आपल्याला अधिकार देऊन देण्यांत आला होता; आपण जिची पाळी इच्छीत स्थगित करून द्यावी. म्हणजे तिला विवाह बंधनांत ठेऊन, तिच्याशी शरीर संबंध करू नये, आणि जिच्याशी इच्छतील, हा संबंध कायम ठेवावा.

९) म्हणजे ज्या पत्नीच्या पाळ्या स्थगित करुन ठेवल्या होत्या, जर आपण इच्छाल की, त्यांच्याशी सुद्धा, संभोगाचा संबंध कायम केला जावा, तर ही परवानगी सुद्धा तुम्हास देण्यात आली आहे.

१०) म्हणजे पाळी स्थगित होण्यात, आणि एकीला दुसरीवर प्राधान्य देण्यावर सुद्धा, त्या समाधानी राहतील आणि खेद करणार नाहीत. आणि जेवढे काही आपल्याकडून त्यांना मिळून जाईल, यावर समाधानी राहतील यासाठी की त्यांना ठाऊक आहे, की, पैगंबर हे सर्व काही अल्लाहचा हुकूम आणि परवानगीने करीत आहेत. आणि या पवित्र पत्न्या, अल्लाहच्या निर्णयावर खूष आणि समाधानी आहेत. काही म्हणतात की, नबी ﷺ ला, हा अधिकार मिळून सुद्धा, आपण याचा उपयोग केला नाही. आणि ह.सौदा ؓ च्या शिवाय, (की, ज्यांनी आपली पाळी स्वत:च ह आयेशा ؓ करिता अर्पण करून दिली होती.) आपण ﷺ नी सर्व पवित्र पत्न्यांच्या पाळ्या समान नक्की करून ठेवल्या होत्या. याचसाठी आपण ﷺ नी मृत्युच्या आजारपणात, पवित्र पत्न्यांची परवानगी घेऊन, आजारपणाचे दिवस, ह. आयेशा ؓ जवळ घालविले, 'अन् तकर्र अअ्युनुहुन्न' चा संबंध आपण (ﷺ) च्या याच पद्धतीने कार्यरत रहाण्याशी आहे. की आपल्यावर ﷺ वांटणी जरी दुसऱ्या लोकांप्रमाणे वाजीब नव्हती, असे असून सुद्धा आपण वांटणी अंगीकारली. अशासाठी की आपल्या पत्नीचे डोळे गार रहावेत. आणि आपल्या या चांगल्या वागणुकीने आणि न्यायाने त्यांनी खूष होऊन जावे की, आपण विशेष अधिकार वापरण्याच्या ऐवजी, त्यांच्या मनधरणी आणि मन राखण्याची व्यवस्था केली.

११) म्हणजे तुमच्या मनांत जे काही आहे, त्यात ही गोष्ट पण नक्कीच आहे, की सर्व पत्नींचे प्रेम मनांत एकसारखे नाही. कारण मनावर मनुष्याला ताबाच नाही. म्हणून पत्नींच्या दर्म्यान, पाळ्यांमध्ये, खाणेपिणे आणि दुसऱ्या जीवनावश्यक गोष्टींवर आणि सुखसोयींवर समानता आवश्यक आहे. ज्याची व्यवस्था मनुष्य करू शकतो. मनांच्या कलामध्ये समानता कारण की, मनुष्याच्या अखत्यारांतच नाही, म्हणून अल्लाहतआला त्यावर पकड पण करणार नाही. या शर्तींवर की, मनाचे प्रेम, कोण्या एका पत्नीशी वेगळ्या वागणुकीला कारणीभूत होऊ नये. याचकरीता नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम सांगत असत, ''हे अल्लाह! ही माझी वांटणी आहे, जी माझ्या अखत्यारात आहे, परंतु ज्या गोष्टींवर तुझा अखत्यार आहे, त्यावर मी अधिकार बाळगत नाही. यात माझी निर्भत्सना करू नकोस!'' (अबुदाऊद, इब्ने माजा, मुसनद अहमद १४४/६)

१२) ज्या महावाक्यात आपल्याला अधिकार देण्यात आला आहे, या महावाक्याच्या अवतरणानंतर पवित्र पत्न्यांनी, ऐहिक ऐश आरामाच्या साधनांच्या मुकाबल्यात गरीबीमध्ये, नबी ﷺ च्या बरोबर रहाणे पसंत केले होते. याचा बदला अल्लाहने हा दिला की, आपणांस त्या पवित्र पत्न्यांशिवाय (ज्यांची संख्या त्यावेळी ९ होती) दुसऱ्या स्त्रियांशी लग्न करणे किंवा त्यांच्यातून कोणाला तलाक देऊन तिच्या जागी आणखी कोणाशी लग्न करण्यापासून मना करून टाकले. काही म्हणतात की नंतर आपणास हा अधिकार देऊन देण्यांत आला होता; परंतु आपण कोणी लग्न केले नाही. (इब्ने कसीर)

१३) म्हणजे दास्या ठेवण्यावर काही बंदी नाही. काहींनी याच्या सर्वसाधारण होण्याचा आधार घेत, म्हटले आहे की, काफिर दासी पण ठेवण्याची आपल्याला परवानगी होती. आणि काहींनी 'वला तुमसिकु बिइस्मिल् कवाफीर'' (काफिर स्त्रियांची इज्जत आपल्या ताब्यात ठेऊ नका) (सू.मुम्तहना-१०) च्या अनुषंगाने याला आपल्यासाठी हलाल समजले नाही. (फत्हुल कदीर)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَدْخُلُوْا بُيُوْتَ النَّبِيِّ اِلَّاۤ اَنْ يُّؤْذَنَ لَكُمْ اِلٰى طَعَامٍ غَيْرَ نٰظِرِيْنَ اِنٰىهُ ۙ وَلٰكِنْ اِذَا دُعِيْتُمْ فَادْخُلُوْا فَاِذَا طَعِمْتُمْ فَانْتَشِرُوْا وَلَا مُسْتَاْنِسِيْنَ لِحَدِيْثٍ ؕ اِنَّ ذٰلِكُمْ كَانَ يُؤْذِى النَّبِيَّ فَيَسْتَحْيٖ مِنْكُمْ ۫ وَاللّٰهُ لَا يَسْتَحْيٖ مِنَ الْحَقِّ ؕ وَاِذَا سَاَلْتُمُوْهُنَّ مَتَاعًا فَسْــَٔلُوْهُنَّ مِنْ وَّرَآءِ حِجَابٍ ؕ ذٰلِكُمْ اَطْهَرُ لِقُلُوْبِكُمْ وَقُلُوْبِهِنَّ ؕ وَمَا كَانَ لَكُمْ اَنْ تُؤْذُوْا رَسُوْلَ اللّٰهِ وَلَاۤ اَنْ تَنْكِحُوْۤا اَزْوَاجَهٗ مِنْۢ بَعْدِهٖۤ اَبَدًا ؕ اِنَّ ذٰلِكُمْ كَانَ عِنْدَ اللّٰهِ عَظِيْمًا ﴿٥٣﴾

**मुसलमानांनो! जोपर्यंत तुम्हाला परवानगी दिली जाणार नाही, तुम्ही पैगंबरांच्या घरात जात जाऊ नका. जेवणाकरीता सुद्धा, परवानगीच्या नंतर जा; हे नाही की, पूर्वीच जाऊन बसून जावे. आणि खाण्यापिण्याची वाट बघत रहावे; किंबहुना जेव्हा बोलाविले जाईल, (तेव्हाच) जा. आणि जेव्हा खाऊन चुकाल ताबडतोब निघून जा. तेथेच गप्पा गोष्टीत व्यस्त होऊन राहत जाऊ नका. पैगंबरांना तुमची ही वागणूक असह्य होते. परंतु ते तुमची शरम ठेवतात. आणि अल्लाहतआला खरी गोष्ट सांगण्यात, कोणाची भीड ठेवत नाही. (१) जेव्हा तुम्ही पैगंबरांच्या पत्नी जवळून कोणती वस्तू मागाल, तेव्हा परद्याच्या आडून मागा. (२) तुमच्या आणि त्यांच्या मनाचे पूर्ण पावित्र्य हेच आहे. (३) आणि तुम्हास हे शोभत नाही की, अल्लाहच्या पैगंबरास इजा द्यावी. (४) आणि न तुम्हास हे विहीत (हलाल) आहे, की, आपल्यानंतर (सल्ल.) कोण्यावेळी पण आपल्या (सल्ल.) पत्नींशी लग्न करावे; लक्षात ठेवा अल्लाहजवळ हा फार मोठा गुन्हा आहे. (५) (५३)**

اِنْ تُبْدُوْا شَيْـًٔا اَوْ تُخْفُوْهُ فَاِنَّ اللّٰهَ كَانَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمًا ﴿٥٤﴾

**तुम्ही कोण्या गोष्टीला जाहीर करा किंवा गुप्त ठेवा. अल्लाह तर प्रत्येक गोष्टीला फार चांगल्या प्रकारे जाणणारा आहे. (५४)**

१) महावाक्याच्या अवतरणाचे कारण हे आहे की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या आमंत्रणावर, ह.जैनब ﷺ च्या वलीम्यामध्ये सहाबा कराम ﷺ आलेत, ज्यांच्यातून काही जेवणानंतर सुद्धा बसून गोष्टी करीत राहिले, ज्याच्याने आपणांस विशेष त्रास झाला. तथापि लज्जा व प्रांजलपणामुळे आपण ﷺ त्यांना जाण्यास सांगितले नाही. (स.बुखारी, तफसीर सू.अहजाब) म्हणून या महावाक्यामध्ये आमंत्रणाचे शिष्टाचार दाखवून देण्यात आले की, एक तर त्या वेळी जा जेव्हा जेवण तयार होऊन चुकले असेल; पहिलेच जाऊन धरणे धरून बसू नका. दुसरे जेवण होताच, आपआपल्या घरी निघून जा. तेथे बसून गोष्टी करीत राहू नका. जेवणाचा उल्लेख तर अवतरणाच्या कारणामुळे आहे. नाहीतर अर्थ हा आहे की, जेव्हा पण तुम्हास बोलाविले जाईल, जेवण्यासाठी किंवा दुसऱ्या कामासाठी परवानगी घेतल्याशिवाय आंत दाखल होऊ नका.

२) हा हुकूम ह.उमर ﷺ च्या इच्छेवर अवतरीत झाला. ह.उमर ﷺ नी नबी ﷺ ला सांगितले, हे रसूलुल्लाह्! आपल्या जवळ चांगले वाईट सर्व प्रकारचे लोक येत असतात; जर आपण ईमानवाल्यांच्या आईंना पर्द्याचा हुकूम द्याल तर किती बरे होईल! ज्यावर अल्लाहने हा हुकूम अवतीर्ण केला. (स.बुखारी, किताबुस् सलात, व तफसीर सू.बकर: सू.मुस्लिम, बाब फजाएले, उमर बिन खत्ताब)

३) हे पर्द्याचे प्रयोजन हुकूम आणि कारण आहे की, याच्याने अभिप्रेत पुरूष आणि स्त्रिया, दोघांची मने, शंके कुशंकेपासून आणि एक दुसऱ्याच्या बरोबर फितन्यांत पडण्यापासून सुरक्षित राहतील.

४) मग पाहिजे तर ते कोणत्याही अनुषंगाने असावे. आपण ﷺ च्या घरात परवानगी शिवाय दाखल होणे, आपल्या इच्छेशिवाय आपल्या ﷺ घरात बसून राहणे. आणि पर्द्याशिवाय ईमानवाल्यांच्या आईंशी बातचित करणे, ह्या गोष्टी पण त्रास देण्याला कारणीभूत आहेत. यापासून पण वाचा!

५) हा हुकूम त्या पवित्र पत्न्यांच्या बाबतीत आहे, ज्या मृत्यूच्या वेळी, नबी ﷺ च्या विवाह बंधनात होत्या. तथापि ज्यांना आपण ﷺ शय्यासोबती नंतर आपल्या जीवनांत, तलाक देऊन आपल्या पासून वेगळे करून दिले असेल, त्या सर्वसाधारण मध्ये दाखल आहेत किंवा नाही? याच्यात दोन मते आहेत. काही यांना पण शामील समजतात. आणि काही नाही. परंतु आपली अशी कोणी पत्नीच नव्हती; म्हणून हे निव्वळ काल्पनिक स्वरूप आहे. याशिवाय एक तिसरा प्रकार ,त्या स्त्रियांचा आहे ज्यांच्याशी आपण ﷺ चे लग्न झाले, परंतु शय्यासोबती पूर्वीच आपण ﷺ नी त्यांना तलाक देऊन टाकला. यांच्याशी दुसऱ्या कोणाचे लग्न योग्य होण्यांत कोणी वाद वाटत नाही.

لَا جُنَاحَ عَلَيْهِنَّ فِيٓ اٰبَآئِهِنَّ وَلَآ اَبْنَآئِهِنَّ وَلَآ
اِخْوَانِهِنَّ وَلَآ اَبْنَآءِ اِخْوَانِهِنَّ وَلَآ اَبْنَآءِ اَخَوٰتِهِنَّ
وَلَا نِسَآئِهِنَّ وَلَا مَا مَلَكَتْ اَيْمَانُهُنَّ ۚ وَاتَّقِيْنَ
اللّٰهَ ۭ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ شَهِيْدًا ﴿٥٥﴾

त्या स्त्रियांवर काही गुनाह नाही की, त्या आपल्या बापांसमोर, आपल्या मुलांसमोर आपल्या भावांसमोर आपल्या पुतण्यांसमोर आणि भाच्यांसमोर आणि स्त्रियांसमोर आणि आपल्या अधिन असलेल्या (दास्या) समोर, त्यांनी व्हावे; (१) (स्त्रियांनो!) अल्लाहला भित रहा. अल्लाहतआला खचितच प्रत्येक गोष्टीला साक्ष आहे(२) ५५

اِنَّ اللّٰهَ وَمَلٰٓئِكَتَهٗ يُصَلُّوْنَ عَلَى النَّبِيِّ ۭ يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ
اٰمَنُوْا صَلُّوْا عَلَيْهِ وَسَلِّمُوْا تَسْلِيْمًا ﴿٥٦﴾

अल्लाहतआला आणि त्याचे देवदूत, या पैगंबरावर दरूद पाठवितात; हे ईमानवाल्यांनो! तुम्ही पण त्यांच्यावर दरूद पाठवा. आणि चांगल्या प्रकारे सलाम पण पाठवित रहा. (३) ५६

اِنَّ الَّذِيْنَ يُؤْذُوْنَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ لَعَنَهُمُ اللّٰهُ
فِي الدُّنْيَا وَالْاٰخِرَةِ وَاَعَدَّ لَهُمْ عَذَابًا مُّهِيْنًا ﴿٥٧﴾

जे लोक अल्लाहला आणि त्याच्या पैगंबराला इजा देतात, त्यांच्यावर इहलोक आणि परलोकांत अल्लाहचा शाप आहे आणि त्यांच्या करिता फारच अपमानकारक शिक्षा आहे. (४) ५७

وَالَّذِيْنَ يُؤْذُوْنَ الْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ بِغَيْرِ مَا
اكْتَسَبُوْا فَقَدِ احْتَمَلُوْا بُهْتَانًا وَّاِثْمًا مُّبِيْنًا ﴿٥٨﴾ ع ٧

आणि जे लोक, कुठल्याही अपराधाशिवाय, ईमानवाल्या पुरूषांना आणि ईमानवाल्या स्त्रियांना इजा पोहचवतील, तर ते मोठेच तोहमत लावणारे आणि धडधडीत गुन्हेगार आहेत(५) ५८ ७ रु ४

يٰٓاَيُّهَا النَّبِيُّ قُلْ لِّاَزْوَاجِكَ وَبَنٰتِكَ وَنِسَآءِ الْمُؤْمِنِيْنَ
يُدْنِيْنَ عَلَيْهِنَّ مِنْ جَلَابِيْبِهِنَّ ۭ ذٰلِكَ اَدْنٰٓى اَنْ يُّعْرَفْنَ
فَلَا يُؤْذَيْنَ ۭ وَكَانَ اللّٰهُ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿٥٩﴾

हे पैगंबरा! आपल्या पत्न्यांना आणि आपल्या मुलींना, आणि मुसलमानांच्या स्त्रियांना सांगून टाका, की, त्यांनी आपल्यावर आपल्या चादरी ओढून घ्याव्यात; (६) यावरून त्यांची ओळख लवकर होऊन जाईल मग न त्या सतावल्या जातील. (७) आणि अल्लाहतआला मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ५९

१) जेव्हां स्त्रियांकरीता परद्याचा हुकूम अवतरीत झाला, तेव्हामग घरात असलेले नातलग किंवा नेहमी येणारे जाणारे नातेवाईक यांच्या बाबतीत प्रश्न निर्माण झाला की, यांच्याशी परदा केला जावा की नाही? म्हणून या महावाक्यात त्या नातेवाईकांचा उल्लेख करून देण्यात आला, ज्यांच्याशी परदा करण्याची आवश्यकता नाही. याचा तपशील सू.नूरच्या आ.३१, 'वला युबदीन जीनत हुन्ना' मध्ये सुद्धा येऊन चुकला आहे. त्याला पाहून घेण्यात यावे.

२) या ठिकाणी स्त्रियांना ईशभयाचा हुकूम देऊन स्पष्ट करून देण्यांत आले आहे की, जर तुमच्या मनात ईशभय असेल, तर परद्याचा जो मूळ उद्देश्य चित्त आणि नजरेची शुद्धता आणि शिलाचे संरक्षण आहे, जो खचित्च तुम्हास प्राप्त होईल. नाही तर, ईशभय नसून फक्त पर्द्याची अंमलबजावणी तुम्हास गुन्ह्यात लिप्त होण्यापासून वांचवू शकत नाही.

३) या महावाक्यात नबी ﷺ च्या त्या मर्तबा आणि महानतेचे वर्णन आहे, जे 'मलई आला' (आकाशा) मध्ये आपणास प्राप्त आहे. आणि ते हे की, अल्लाह तबारक व तआला, देवदुतांमध्ये आपण ﷺ चा गौरव आणि स्तुती करतो, आणि आपल्यावर दया पाठवितो. आणि देवदूत सुद्धा आपल्या उच्च दर्जासाठी प्रार्थना करतात. याच्या बरोबरच अल्लाहतआलाने आलमे सुफला ला (जमिनवाल्यांना) हुकूम दिला की, त्यांनी सुद्धा आपल्यावर ﷺ दरूद व सलाम पाठवावा; हदीसमध्ये येते, सहाबा किराम (रजी.) नी विचारले, या रसूलुल्लाह! सलामची रीत तर आम्ही जाणतो, (म्हणजे अत्तहियांत मध्ये, ''अस्सलामु अलैका अय्युहन् नबीय्यु'' म्हणत असतो.) आम्ही दरूद कशा प्रकारे म्हणावा? यावर आपण ﷺ नी तो दरूदे इब्राहीम सांगितला, जो नमाज मध्ये पढला जातो. (स.बुखारी तफसीर सु.अहजाब) याच्या शिवाय हदीशीमध्ये दरूदचे आणखी पण सेगे येतात ते पढले जाऊ शकतात. तसेच संक्षिप्त ''ﷺ'' पण पढले जाऊ शकते; तथापि ''अस्सलातु वस्सलामु अलैका या रसूलल्लाह'' पढणे या साठी बरोबर नाही की, याच्यांत नबी ﷺ शी संबोधन आहे; आणि याला म्हणणाऱ्या अशा चुकीच्या श्रद्धेने म्हणतो की, आपण ﷺ खरोखर ऐकतात. ही चुकीची श्रद्धा कुरआन व हदीसच्या विरुद्ध आहे. आणि या श्रद्धेने चर्चित मनघडत दरूद पढणे पण चूक आहे. अशाचप्रकारे अजानच्या पूर्वी त्याला पढणे पण बिदअत आहे. जे पुण्य नाही, गुन्हा आहे. हदीशीमध्ये दरूदचे मोठे महात्म्य सांगितले आहे. नमाजमध्ये याचे पढणे वाजीब आहे. का, सुन्नत? बहुसंख्य धर्मपंडीत त्याला सुन्नत समजतात. आणि इमाम शाफई आणि पुष्कळसे आलीम, वाजीब, आणि हदीशींनी याच्या वाजीब होण्याचेच समर्थन होते. अशाचप्रकारे हदीशींनी हे पण माहित होते की, ज्याप्रमाणे शेवटच्या तश्शहुद् मध्ये, दरूद पढणे वाजीब आहे, पहिल्या तश्शहुद् मध्ये दरूद पढण्याची तीच स्थिती आहे. म्हणून नमाजच्या दोन्ही तश्शहुद् मध्ये दरूद पढणे आवश्यक आहे. दरूदच्या दुसऱ्या मशाइलसाठी पहावे इमाम इब्ने कय्यीम (रह.) चे ''जिलाऊल ईफ्हाम पुस्तक,

किंवा त्याचे उर्दू भाषांतर काझी सुलैमान मन्सुरपुरी ने केलेले. तसेच ''अहसनुल कलाम फीस् सलात वस्सलाम अला नबीयु खैरूल अनाम'' लेखक मौलाना अ.गफुर असरी, सियाल कोट. याच्यात दोन्ही तश्शहुद मध्ये, दरूद पढण्याच्या प्रमाणांवर आवश्यक चर्चा आहे. याशिवाय अल्बानीचे, सिफतो सलातिन् नबी (अरबी) पृष्ठ १४५ पण पहावे.)

४) अल्लाहला इजा देण्याचा अर्थ, त्या कृत्यांचे करणे आहे, ज्यांना तो नापसंत करतो. नाही तर अल्लाहला इजा पोहचवण्यावर कोण समर्थ आहे? जसे मुशरिकीन, यहूदी आणि ख्रिस्ती वगैरे, अल्लाह करीता संतती सिद्ध करतात. किंवा ज्याप्रमाणे हदीस कुदसीमध्ये आहे, अल्लाहतआला फर्मावितो, ''आदमचा मुलगा मला इजा देतो. जमान्याला (काळाला) शिव्या देतो, वास्तविक मीच काळ आहे. याचे रात्र आणि दिवसाचे येणे जाणे, माझ्याच हुकूमाने होते.'' (स.बुखारी स. मुस्लिम) म्हणजे हे म्हणणे की काळाने असा वाईट करून दिला, हे बरोबर नाही. यासाठी की कृत्ये अल्लाहची आहेत, काळ किंवा आकाशाची नाहीत. अल्लाहच्या पैगंबराला इजा पोहचविणे, आपल्याला ﷺ खोटे ठरविणे आपल्याला कवी, पाखंडी, जादूगार वगैरे म्हणणे आहे. याशिवाय काही हदीशीमध्ये, सहाबा किराम (रजी.) ला इजा पोहचविणे आणि त्यांच्यावर टिका आणि अपमानाला सुद्धा, आपण ﷺ नी इजा देणे ठरविले आहे. लआनतचा अर्थ, अल्लाहच्या रहमतपासून दूरी आणि रहमतपासून वंचित् होणे आहे.

५) म्हणजे त्यांना बदनाम करण्यासाठी त्यांच्यावर खोटा आळ घेणे, त्यांच्यावर अयोग्य टिका, आणि त्यांचा अपमान करणे, जसे रवाफिज, सहाबा किराम ﷺ ना कोसतात, त्यांना बरे वाईट म्हणतात. आणि त्यांच्याकडे अशा गोष्टी लावतात, ज्या त्यांनी कधी केल्या नाहीत. इमाम इब्ने कसीर म्हणतात, ''राफजी उलट्या अंत:करणाचे आहेत. प्रशंसनीय व्यक्तींची निंदा करतात आणि निंदनीय लोकांची प्रशंसा करतात.''

६) 'जलाबीब' 'जिल्बाब' चे अनेकवचन आहे; जे अशा मोठ्या चादरीला म्हणतात, जिच्याने पूर्ण शरीर झांकले जावे. आपल्यावर चादर लटकविण्याने अभिप्रेत आपल्या चेहऱ्यावर अशा प्रकारे घुंघट घेणे आहे की, ज्याच्याने चेहऱ्याचा जास्तीत जास्त भाग पण लपविला जाईल. आणि दृष्टी खाली ठेवून चालण्याने तिला रस्ता पण दिसावा. पाकिस्तान, हिंदुस्थान किंवा दुसऱ्या इस्लामी देशांमध्ये बुरख्यांचे जे वेगवेगळे प्रकार आहेत, पैगंबरी काळात, हे बुरखे असे साधारण नव्हते. नंतर मग समाजात तो साधेपणा राहिला नाही, जो पैगंबरांच्या काळात, आणि सहाबा ﷺ आणि ताबेईन (रह.) च्या काळात होता. स्त्रियां फारच साधा पोषाख घालत असत. बनाव, शृंगार आणि नटणे थटण्याच्या प्रदर्शनाची काही भावना त्यांच्यात नव्हती. परंतु नंतर हा साधेपणा राहिला नाही. त्याची जागा शान शौकत आणि शृंगारेने घेऊन घेतली. आणि स्त्रियांमध्ये, भडक आणि चमचमीत पोषाख, आणि दागिन्यांचे प्रदर्शन सर्वसाधारण होऊन गेले. ज्यामुळे चादरीने परदा करणे कठीण होऊन गेले. आणि त्याच्या जागी वेगवेगळ्या प्रकारचे बुर्के सर्रास होऊन गेलेत. जरी यामुळे काही वेळा विशेषत: कडक गर्मीत काही अडचण पण भासते. परंतु हा जरासा त्रास, शरीयतच्या तगाद्यांच्या मुकाबल्यात काही महत्त्व ठेवत नाही; तथापि जी स्त्री, बुर्क्याच्या शिवाय, परद्याकरीतां, मोठी चादर वापरते, आणि सर्व शरीराला झांकते, आणि चेहऱ्यावर खऱ्या अर्थाने घुंघट टाकते; ती खचित्‌च पर्द्याच्या हुकूमाची अंमलबजावणी करते. कारण की, बुर्का अशी आवश्यक गोष्ट नाही, ज्याला शरिअतने, परद्याकरीतांआवश्यक ठरविले असावे. परंतु आजकाल स्त्रियांनी चादरीला बेपर्दा होण्याचे साधन बनवून घेतले आहे. प्रथम ती बुर्क्याच्या जागी चादर ओढण्याला सुरवात करते. मग चादर पण अदृष्य होऊन जाते. फक्त दुपट्टा राहून जातो. आणि काही स्त्रियांना याचे घेणे पण दुरापास्त होऊन गेले आहे. ही सध्याची परिस्थिती पाहता, म्हणावेसे वाटते की आता बुर्क्याचा उपयोगच योग्य आहे; कारण की जेव्हापासून बुर्क्याची जागा चादरीने घेतली आहे बेपरदगी सरार्स झाली आहे. किंबहुना स्त्रियांअर्धनग्नतेवर सुद्धा अभिमान बाळगूंलागल्या आहेत. फइन्नालिल्लाह् व इन्ना इलैहि राजेऊन. तथापि या महावाक्यांत, नबी ﷺ च्या पत्न्या, मुली आणि सर्वसाधारण ईमानवाल्या स्त्रियांना घरातून बाहेर निघतांना परद्याचा हुकूम देण्यांत आला आहे. ज्याने स्पष्ट आहे की, परद्याचा हुकूम धर्मपंडीतांनी (उल्मा) शोधून काढलेला नाही. जसे की, आजकाल काही लोक सांगत असतात किंवा याला खरोखर किंमत देत नाही; किंबहुना हा अल्लाहचा हुकूम आहे, जो कुरआन करीमच्या स्पष्ट महावाक्याने (नस्स ) सिद्ध आहे. याला आक्षेप घेणे नाकारणे आणि बेपर्दा होण्यावर आग्रह, कुफ्र पर्यंत पोहचवू शकतो. दुसरी गोष्ट याच्याने ही ठाऊक झाली की, नबी ﷺ ची एक मुलगी नव्हती. जशी की, राफजींची धारणा आहे. किंबहुना आपल्याला एकापेक्षा जास्त मुली होत्या. जसे की कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याने स्पष्ट आहे. आणि त्या चार होत्या जसे की, इतिहास, आपले जीवन चरित्र आणि हदीसींच्या पुस्तकांनी सिद्ध आहे.

७) हे परद्याचे प्रयोजन आणि त्याचे फायदे आहे की, याच्याने एक सज्जन स्त्री आणि शिलवान स्त्री, आणि निर्लज्ज आणि कुकृत्य करणारी स्त्री यांच्या दर्म्यान ओळखली जाईल. परद्याने ठाऊक होईल की ही खानदानी स्त्री आहे. जिची छेडछाड करण्याची कोणाला हिम्मत होणार नाही. याच्या उलट बेपर्दा स्त्री, टपोरी व उनाड लोकांच्या नजरेचे केंद्र आणि छेडछाड करण्याचे ठिकाण होईल.

لَئِنْ لَّمْ يَنْتَهِ الْمُنٰفِقُوْنَ وَالَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ وَّالْمُرْجِفُوْنَ فِي الْمَدِيْنَةِ لَنُغْرِيَنَّكَ بِهِمْ ثُمَّ لَا يُجَاوِرُوْنَكَ فِيْهَآ اِلَّا قَلِيْلًا ﴿٦٠﴾

जर आता सुद्धा हे दांभिक, आणि ते ज्यांच्या मनांत रोग आहे, आणि मदीनेचे ते लोक जे चुकीच्या अफवा उडवत असतात, [१] यापासून त्यांनी माघार घेतली नाही; तर आम्ही आपणांस त्याच्या (बर्बादी) वर लादून देऊ. मग तर ते फारच थोडे दिवस, आपल्याबरोबर (या शहरांत) राहूंशकतील (६०)

مَّلْعُوْنِيْنَ ۚ اَيْنَمَا ثُقِفُوْٓا اُخِذُوْا وَقُتِّلُوْا تَقْتِيْلًا ﴿٦١﴾

त्यांच्यावर धुत्कार वर्षविली गेली. जेथे पण भेटतील, पकडले जावेत, आणि त्यांचे तुकडे तुकडे करण्यांत यावी. [२] (६१)

سُنَّةَ اللّٰهِ فِي الَّذِيْنَ خَلَوْا مِنْ قَبْلُ ۚ وَلَنْ تَجِدَ لِسُنَّةِ اللّٰهِ تَبْدِيْلًا ﴿٦٢﴾

यांच्या पूर्वीच्या लोकांमध्ये सुद्धा, अल्लाहचा हाच दस्तुर चालूं राहिला; आणि तू अल्लाहच्या दस्तुर मध्ये कधी फेरबदल पावणार नाहीस (६२)

يَسْـَٔلُكَ النَّاسُ عَنِ السَّاعَةِ ۗ قُلْ اِنَّمَا عِلْمُهَا عِنْدَ اللّٰهِ ۗ وَمَا يُدْرِيْكَ لَعَلَّ السَّاعَةَ تَكُوْنُ قَرِيْبًا ﴿٦٣﴾

लोक, आपणांस कयामतच्या बाबतीत प्रश्न विचारतात, आपण सांगून द्या! की, याचे ज्ञान तर अल्लाहलाच आहे. आपणास काय ठाऊक. फार शक्य आहे की, कयामत फारच जवळ (आली) असावी. (६३)

اِنَّ اللّٰهَ لَعَنَ الْكٰفِرِيْنَ وَاَعَدَّ لَهُمْ سَعِيْرًا ﴿٦٤﴾

अल्लाहतआलाने काफिरांना शापित केले आहे; आणि त्यांच्या करता, भडकलेली आग तयार करून ठेवली आहे. (६४)

خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ۚ لَا يَجِدُوْنَ وَلِيًّا وَّلَا نَصِيْرًا ﴿٦٥﴾

ते त्यात सदा सर्वदा राहतील. ते कोणी पुरस्कर्ता आणि मददगार पावणार नाहीत (६५)

يَوْمَ تُقَلَّبُ وُجُوْهُهُمْ فِي النَّارِ يَقُوْلُوْنَ يٰلَيْتَنَآ اَطَعْنَا اللّٰهَ وَاَطَعْنَا الرَّسُوْلَا ﴿٦٦﴾

त्या दिवशी त्यांचे चेहरे आगीत उलटे पालटे केले जातील. (खेद आणि दु:खाने) म्हणतील की, जर आम्ही अल्लाहतआला आणि (त्याच्या) पैगंबरा (सल्ल.) चे आज्ञापालन केले असते! (६६)

وَقَالُوْا رَبَّنَآ اِنَّآ اَطَعْنَا سَادَتَنَا وَكُبَرَآءَنَا فَاَضَلُّوْنَا السَّبِيْلَا ﴿٦٧﴾

आणि म्हणतील की हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही आमच्या सरदारांचा आणि आमच्या बड्या लोकांचा कह्या मानला; ज्यांनी आम्हाला सरळ मार्गाहून बहकवून टाकले. [३] (६७)

رَبَّنَآ اٰتِهِمْ ضِعْفَيْنِ مِنَ الْعَذَابِ وَالْعَنْهُمْ لَعْنًا كَبِيْرًا ﴿٦٨﴾

हे आमच्या पालनकर्त्या! तू यांना दुहेरी शिक्षा दे! आणि फार मोठा शाप दे!! (६८)

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَكُوْنُوْا كَالَّذِيْنَ اٰذَوْا مُوْسٰى فَبَرَّاَهُ اللّٰهُ مِمَّا قَالُوْا ۗ وَكَانَ عِنْدَ اللّٰهِ وَجِيْهًا ﴿٦٩﴾

हे ईमानवाल्यांनो! त्या लोकांसारखे बनून जाऊ नका, ज्यांनी मूसाला त्रास दिला; जी तोहमत ते लावित होते, अल्लाहने त्यांना यापासून मुक्त करून दिले. [४] आणि ते अल्लाहजवळ अब्रुदार होते. (६९)

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّقُوا اللّٰهَ وَقُوْلُوْا قَوْلًا سَدِيْدًا ﴿٧٠﴾

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहतआलाला भ्या; आणि सरळ, सरळ (खऱ्या) गोष्टी करीत जा. [५] (७०)

يُّصْلِحْ لَكُمْ اَعْمَالَكُمْ وَيَغْفِرْ لَكُمْ ذُنُوْبَكُمْ ۗ وَمَنْ يُّطِعِ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ فَقَدْ فَازَ فَوْزًا عَظِيْمًا ﴿٧١﴾

कारण की अल्लाहतआलाने तुमची कामे चांगली करून द्यावी; आणि तुमचे अपराध क्षमा करून टाकावीत. [६] आणि जो पण, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करील, त्याने साफल्य साधले. (७१)

اِنَّا عَرَضْنَا الْاَمَانَةَ عَلَى السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَالْجِبَالِ فَاَبَيْنَ اَنْ يَّحْمِلْنَهَا وَاَشْفَقْنَ مِنْهَا وَحَمَلَهَا الْاِنْسَانُ ۗ اِنَّهٗ كَانَ ظَلُوْمًا جَهُوْلًا ﴿٧٢﴾

आम्ही आपल्या अमानतीला, आकाशांवर, पृथ्वीवर आणि पर्वतांवर सादर केले, परंतु सर्वांनी इला उचलण्याला नकार दिला; आणि तिला भिऊन गेलेत; परंतु माणसाने तिला उचलून घेतले. [७] तो फारच अनर्थकारी आणि अज्ञानी आहे. [८] (७२)

१) मुसलमानांची हिम्मत कमी करण्यासाठी, ढांभिक लोक अफवा उडवित असत की, मुसलमान अमक्या इलाख्यात पराभूत होऊन गेलेत. किंवा शत्रुंचे फार मोठे सैन्य हल्ला करण्यासाठी येत आहे. वगैरे वगैरे.

२) हा हुकूम नाही की, यांना पकडून पकडून मारून टाकण्यांत यावे; किंबहुना शाप आहे की, जर ते आपल्या ढांभिकपणा पासून आणि अशा कृत्यापासून माघार घेणार नाही, तर यांचा फारच धडा घेण्यासारखा शेवट होईल. काही म्हणतात की, हा हुकूम आहे परंतु हे ढांभिक लोक, या महावाक्याच्या अवतरणानंतर, आपल्या कृत्यांकडून परावृत्त झाले होते; म्हणून

त्यांच्या विरूद्ध ही कार्यवाही केली गेली नाही, ज्याचा हुकूम या महावाक्यांत दिला गेला होता. (फत्हूल कदीर)
३) म्हणजे आम्ही तुझे पैगंबर आणि धर्माचे आवाहक यांचे ऐवजी, आपल्या त्या मोठ्या आणि बुजूर्ग लोकांचे अनुकरण केले; परंतु आज आम्हास ठाऊक झाले की, त्यांनी आम्हाला तुझ्या पैगंबराकडून दूर ठेवून सरळ मार्गाहून भटकवून ठेवले. वाडवडीलांचे आणि मोठ्यांचे अनुकरण आजसुद्धा लोकांच्या बहकण्याला कारणीभूत आहे. जर मुसलमान अल्लाहच्या महावाक्यांवर मनन करून या पायवाटांतून निघून कुरआन व हदीसच्या सरळ मार्गाचा अंगीकार करते की, मुक्ती फक्त आणि फक्त अल्लाह व रसूलच्या अनुकरणांतच आहे, न तर बुजूर्ग लोक आणि मोठे लोक यांच्या अंधानुकरणांत किंवा न तर वाडवडीलांच्या पुराण्या आणि जीर्ण पद्धतींना अंगिकार करण्यामध्ये.
४) याचे भाष्य हदीसमध्ये अशाप्रकारे आलेले आहे की, मूसा عليه السلام फारच लाजाळूं होते. म्हणून त्यांनी आपले शरीर, कधी लोकांसमोर नग्न केले नाही. बनु इस्राईल म्हणूं लागले की, कदाचित् मूसा عليه السلام च्या शरीरावर कोडाचे डाग, किंवा कोणी अशा प्रकारचा दोष आहे. म्हणून हे नेहमी पोषाखांत झांकलेले रहातात. एकदा ह. मूसा عليه السلام एकांतात आंघोळ करू लागले. कपडे उतारून एका दगडावर ठेवून दिले. दगड (अल्लाहच्या हुकुमाने) कपडे घेऊन पळूं लागला. ह.मूसा عليه السلام याच्यामागे पळाले, येथ पावेतो की, बनी इस्राईलच्या एका सभेत जाऊन पोहचले, त्यांनी ह.मूसा عليه السلام ला नग्न पाहिले. तर त्यांच्या साऱ्या शंका दूर होऊन गेल्यात. ह.मूसा عليه السلام फारच सुंदर आणि रूपवान, आणि प्रत्येक प्रकारच्या डागापासून व शारीरिक विद्रुपता यापासून मुक्त होते. अशा तऱ्हेने अल्लाहतआलाने चमत्कारिक पणे दगडाच्या मार्फत त्यांचे आरोप आणि शंका यांचेपासून सुटका करून दिली. जो बनी इस्राईल कडून त्यांच्यावर करण्यांत येत होता. (स.बुखारी किताबुल अंबिया) ह.मूसा عليه السلام च्या हवाल्याने, ईमानवाल्यांना समजाविण्यांत येत आहे, की, तुम्ही आमचे शेवटचे पैगंबर ह.मुहम्मद ﷺ ला, बनी इस्राईल प्रमाणे त्रास देऊ नका. आणि आपल्या बाबतीत अशी गोष्ट करू नका, जिला ऐकूनआपण ﷺ ला दु:ख आणि खेद वाटावा. जसे एका प्रसंगी गनीमतच्या संपत्तीची वाटणी करतांना, एक मनुष्य म्हणाला की, याच्यांत न्यायाने काम घेण्यांत आले नाही. जेव्हा आपल्या ﷺ पर्यंत हे शब्द पोहचले, तर फारच क्रोधायमान होऊन गेले, येथ पावेतो की आपला शुभ चेहरा लाल होऊन गेला. आपण फर्माविले, ''मूसावर अल्लाहची दया होवो! त्यांना याच्यापेक्षा कितीतरी जास्त इजा पोहचविण्यांत आली. परंतु त्यांनी सहनशिलता पत्करली.'' (स.बुखारी, स.मस्लिम)
५) म्हणजे अशी गोष्ट जिच्यांत वांकडेपणा आणि हेरफेर असावा, न धोका आणि फसवणूक किंबहुना खरी आणि सत्य असावी. 'सदीद' ''तसदिदुल् सहम'' पासून आहे. म्हणजे ज्याप्रमाणे बाणाला सरळ करण्यांत येते. कारण की सरळ निशाण्यावर जाऊन लागावा. अशाचप्रकारे तुमच्या तोंडातून निघालेली गोष्ट, आणि तुमचे चारित्र्य आणि कर्तृत्व, सत्त्यावर आधारित असावे. सत्य आणि चांगुलपणा पासून केसाएवढे पण दूर असू नये.
६) हे ईशभय आणि खरे बोलण्याचा परिणाम आहे की, तुमच्या कर्मांत सुधारणा होईल, आणि आणखी चांगल्या गोष्टी तुम्हाला बहाल करण्यांत येतील. आणि जर काही कमी कोताई राहून गेली, तर तिला अल्लाहतआला क्षमा करून टाकेन.
७) जेव्हा अल्लाहतआलाने आज्ञाधारकांचा मोबदला आणि पुण्यप्रतिफल आणि गुन्हेगारांचे संकट आणि शिक्षा सांगून टाकली, तर आतांशरिअतचे आदेश आणि त्यांची सक्ती यांची चर्चा करण्यात येत आहे. अमानतीने ते शरीअतचे आदेश फर्ज आणि वाजीब अभिप्रेत आहेत, ज्यांच्यावर अंमलबजावणीने पुण्य आणि त्यांच्यापासून तोंड फिरविल्याने आणि त्यांचा इन्कार केल्याने शिक्षा होईल. जेव्हाशरीअत आकाश, पृथ्वी आणि पर्वतांवर सादर केली गेली, तर ते याच्या उचलण्यापासून भिऊन गेले. परंतु जेव्हा हे मनुष्यावर ही गोष्ट सादर केली गेली, तर त्याने अल्लाहच्या आज्ञापालना (अमानत) चा मोबदला आणि पुण्यप्रतिफळ यांचे महात्म्य बघून या मोठ्या ओझ्याला उचलण्यास तो तयार होऊन गेला. शरीअतच्या आदेशांना, अमानत संबोधून इशारा करून दिला की, यांचे अदा करणे माणसांवर अशाचप्रकारे आवश्यक आहे. ज्याप्रमाणे अमानतला अदा करणे आवश्यक असते. सादर करण्याचा अर्थ काय आहे? आणि आकाश, पृथ्वी आणि पर्वतांनी कशा प्रकारे उत्तर दिले? आणि माणसाने याला कोणत्या वेळी मान्य केले? याची संपूर्ण माहिती न आम्ही जाणू शकतो, न त्याला वर्णन करू शकतो. आम्हांस विश्वास ठेवावयांस पाहिजे की, अल्लाहने आपल्या प्रत्येक सृष्टींत, एका विशिष्ट प्रकारची जाणीव आणि समज ठेवलेली आहे; जरी आम्ही याच्या वास्तवाशी परिचित नाही. पण अल्लाहतआला तर त्यांचे बोलणे समजण्यांस समर्थ आहे. त्याने जरूर या अमानतीला, त्यांच्यावर सादर केली असेल; ज्याला मान्य करण्याला त्यांनी नकार दिला. आणि हा नकार त्यांनी शिरजोरी आणि बंडखोरी यांच्या आधारावर दिला नाही; किंबहुना याच्यांत ही भीती कार्यरत होती की, जर आम्ही या अमानतचे तगादे पूर्ण करूशकलो नाहीत, तर त्याची कडक शिक्षा आम्हांस भोगावी लागेल. मनुष्य कारण की, उतावळा आहे, त्याने शिक्षेच्या बाजूवर जास्त विचार केला नाही. आणि त्याचे महात्म्य प्राप्त करण्याच्या आवडीने, या जबाबदारीचा स्वीकार करून टाकला.
८) म्हणजे हे कठीण ओझे उचलून त्याने आपल्या जिवावर जुलूम करण्याचा प्रयत्न आणि त्याच्या तगाद्यांकडून दुर्लक्ष किंवा त्याची कदर आणि किंमत पासून दुर्लक्ष करून, अज्ञानाचे प्रदर्शन केले.

لِيُعَذِّبَ اللّٰهُ الْمُنٰفِقِيْنَ وَالْمُنٰفِقٰتِ وَالْمُشْرِكِيْنَ وَالْمُشْرِكٰتِ وَيَتُوْبَ اللّٰهُ عَلَى الْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ ؕ وَكَانَ اللّٰهُ غَفُوْرًا رَّحِيْمًا ﴿٧٣﴾

(हे यासाठी) की, अल्लाहतआलाने दांभिक पुरूष, स्त्रियांना, आणि मुशरिक पुरूष स्त्रियांना शिक्षा द्यावी; आणि ईमानवाल्या पुरूष स्त्रियांचा पश्चात्ताप मान्य [१] करावा. आणि अल्लाहतआला मोठाच क्षमाकर्ता आणि दयाळूंआहे. (७३)

آياتها ٥٤ (٣٤) سُوْرَةُ سَبَإٍ مَّكِّيَّةٌ (٥٨) ركوعاتها ٦

महावाक्ये ५४ | **(३४) सू. सबा** | रुकूअ ६

## (३४) सू. सबा

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اَلْحَمْدُ لِلّٰهِ الَّذِيْ لَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ وَلَهُ الْحَمْدُ فِي الْاٰخِرَةِ ؕ وَهُوَ الْحَكِيْمُ الْخَبِيْرُ ﴿١﴾

सर्व स्तुती, त्या खऱ्या उपास्याला योग्य आहे, ज्याच्या मालकीत ते सर्व काही आहे, जे आकाश आणि पृथ्वीत आहे. [२] परलोकांत सुद्धां, स्तुती त्याच्याचसाठी आहे. [३] तो मोठा बुद्धीमान आणि पूर्ण जाणणारा आहे. (१)

يَعْلَمُ مَا يَلِجُ فِي الْاَرْضِ وَمَا يَخْرُجُ مِنْهَا وَمَا يَنْزِلُ مِنَ السَّمَآءِ وَمَا يَعْرُجُ فِيْهَا ؕ وَهُوَ الرَّحِيْمُ الْغَفُوْرُ ﴿٢﴾

जे जमिनीत जाईल, [४] आणि जे इच्यातून निघेल, जे आकाशांतून उतरेल, [५] आणि जे चढून त्याच्यांत जाईल, [६] तो सर्व काही जाणतो. आणि तो दयाळूंआणि फारच क्षमाशील आहे. (२)

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَا تَاْتِيْنَا السَّاعَةُ ؕ قُلْ بَلٰى وَرَبِّيْ لَتَاْتِيَنَّكُمْ ۙ عٰلِمِ الْغَيْبِ ۚ لَا يَعْزُبُ عَنْهُ مِثْقَالُ ذَرَّةٍ فِي السَّمٰوٰتِ وَلَا فِي الْاَرْضِ وَلَآ اَصْغَرُ مِنْ ذٰلِكَ وَلَآ اَكْبَرُ اِلَّا فِيْ كِتٰبٍ مُّبِيْنٍ ﴿٣﴾

काफिर म्हणतात की, आमच्यावर कयामत येणार नाही; आपण सांगून द्या की, मला माझ्या पालनकर्त्याची शपथ ! जो अदृष्टाचा ज्ञाता आहे, ती खचित्‌च तुमच्यावर येईल; [७] अल्लाहतआलाकडून एका कणा ऐवढी वस्तूं सुद्धां गुप्त नाही; [८] न आकाशांत आणि न पृथ्वीत किंबहुना या पेक्षां सुद्धां लहान किंवा मोठी प्रत्येक वस्तूंखुल्या पुस्तकांत (नोंदविलेली) आहे. [९] (३)

१) याचा संबंध 'हमलहा' शी आहे. म्हणजे मनुष्याला या अमानतीचा जबाबदार बनविण्याने, उद्देश्य हा आहे की, निफाकवाले आणि शिर्कवाले, यांचे निफाक आणि शिर्क, आणि ईमानवाल्यांचे ईमान जाहीर होऊन जावे. मग याच्याप्रमाणे त्यांना बक्षीस किंवा शिक्षा दिली जावी.

२) म्हणजे त्याच्याच मालकीत आणि त्याच्याच अधिकारांत आहे. त्याचा इरादा आणि निर्णय त्यांच्यात लागू होतो. मनुष्याला जी पण देणगी मिळते, ती त्याचीच निर्माण केलेली आहे. आणि त्याचाच उपकार आहे. म्हणून आकाश आणि पृथ्वीच्या प्रत्येक वस्तुची स्तुती वास्तविक त्या देणग्यांवर अल्लाहचीच प्रसंशा आणि स्तुती आहे. ज्याच्याने त्याला आपल्या सृष्टीला उपकृत केले आहे.

३) ही स्तुती कयामतच्या दिवशी ईमानवाले करतील; उदाहरणार्थ ''अल्हमदु लिल्लहिल लजी सदकना वअ्दहु'' (सू.जुमर-७४) अल्हमदु लिल्लहिल लजी हदाना लिहाजा (सू.आअ्राफ-४३) ''अल्हमदु लिल्लाहिल लजी अज्हब अन्नल् हजना'' (सू.फातिर-३४) वगैरे आयाती तथापि इहलोकांत अल्लाहची प्रसंशा आणि स्तुती उपासना आहे. ज्याला करणे मनुष्याला आवश्यक आहे आणि परलोकांत हे ईमानवाल्यांचे आत्मिक समाधान असेल, ज्यामुळे त्यांना गोडी आणि खुषी जाणवत राहील. (फत्हुल कदीर)

४) उदाहरणार्थ पाऊस, खजिने आणि गुप्तधन.

५) पाऊस, गारा, गर्जना, वीज आणि अल्लाहकडून बरकती वगैरे. तसेच देवदूत आणि आकाशी ग्रंथाचे अवतरण.

६ म्हणजे देवदूत, आणि सेवकांची कर्मे.

७) शपथ पण खाल्ली आणि सेगा पण ताकदीचा त्याच्यावर आणखी लाम ताकीद (चा) म्हणजे कयामत कां येणार नाही ? ती तर कुठल्याही परिस्थितीत खचित्‌च येणार म्हणजे येणार.

८) ''ला यअजुबू'' अदृष्य आणि गुप्त आणि दूर नाही. म्हणजे जेव्हांआकाश आणि पृथ्वाचा कोणी कण याच्यापासून अदृष्य आणि गुप्त नाही; तर मग तुमचे विखुरलेले अवयव जे मातीत मिळून गेले असतील, जमा करून दुसऱ्यांदा तुम्हांस जिवंत करून देणे, का अवश्य व्हावे ?

९) म्हणते जे लौहे महफूज मध्ये उपस्थित आणि नोंदविलेले आहे.

لِّيَجْزِيَ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ ۚ أُولَٰئِكَ لَهُم مَّغْفِرَةٌ وَرِزْقٌ كَرِيمٌ ﴿٤﴾

कारण की त्याने ईमानवाल्यांना आणि चांगली कामे करणाऱ्यांना उत्तम बदला, बहाल करावा.[१] हेच ते लोक आहेत, ज्यांच्याकरीता क्षमा आणि आदर सन्मानाची अन्न संपत्ती आहे. ④

وَالَّذِينَ سَعَوْ فِي آيَاتِنَا مُعَاجِزِينَ أُولَٰئِكَ لَهُمْ عَذَابٌ مِّن رِّجْزٍ أَلِيمٌ ﴿٥﴾

आणि आमच्या निशाण्यांना कमी लेखण्याचा ज्यांनी प्रयत्न केला[२] आहे, हे ते लोक आहे, ज्यांच्या करीतां दु:खप्रद यातनेची शिक्षा आहे. ⑤

وَيَرَى الَّذِينَ أُوتُوا الْعِلْمَ الَّذِي أُنزِلَ إِلَيْكَ مِن رَّبِّكَ هُوَ الْحَقَّ وَيَهْدِي إِلَىٰ صِرَاطِ الْعَزِيزِ الْحَمِيدِ ﴿٦﴾

आणि ज्यांना ज्ञान आहे, ते पाहून घेतील, की जे काही ते आपल्याकडे आपल्या पालनकर्त्याकडून अवतरीत झाले आहे, (ते निव्वळ) सत्य आहे[३] आणि अल्लाह परम समर्थ स्त्युत्याचा मार्ग दाखवितो.[४] ⑥

وَقَالَ الَّذِينَ كَفَرُوا هَلْ نَدُلُّكُمْ عَلَىٰ رَجُلٍ يُنَبِّئُكُمْ إِذَا مُزِّقْتُمْ كُلَّ مُمَزَّقٍ إِنَّكُمْ لَفِي خَلْقٍ جَدِيدٍ ﴿٧﴾

आणि काफिरांनी म्हटले,[५] (या!) आम्ही तुम्हांस एक असा मनुष्य दाखवितो,[६] जो तुम्हांस अशी बातमी पोहचवित आहे,[७] जेव्हा तुम्ही बिलकुल कण कण होऊन जाल, तेव्हां तुम्ही मग पुन्हा एका नव्या जन्मांत याल[८] ⑦

أَفْتَرَىٰ عَلَى اللَّهِ كَذِبًا أَم بِهِ جِنَّةٌ ۗ بَلِ الَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِالْآخِرَةِ فِي الْعَذَابِ وَالضَّلَالِ الْبَعِيدِ ﴿٨﴾

(आम्ही सांगू शकत नाही की,) स्वत: त्यानेच अल्लाहवर खोटे कुभांड रचले आहे किंवा त्याला वेड आहे.[९] तथापि (वास्तविकता ही आहे की) परलोकावर विश्वास न ठेवणारेच शिक्षेमध्ये आणि दुरच्या बहकण्यामध्ये (पडलेले) आहेत[१०] ⑧

أَفَلَمْ يَرَوْا إِلَىٰ مَا بَيْنَ أَيْدِيهِمْ وَمَا خَلْفَهُم مِّنَ السَّمَاءِ وَالْأَرْضِ ۚ إِن نَّشَأْ نَخْسِفْ بِهِمُ الْأَرْضَ أَوْ نُسْقِطْ عَلَيْهِمْ كِسَفًا مِّنَ السَّمَاءِ ۚ إِنَّ فِي ذَٰلِكَ لَآيَةً لِّكُلِّ عَبْدٍ مُّنِيبٍ ﴿٩﴾

तर काय मग ते आपल्या मागे पुढे, आकाश व पृथ्वीला पहात नाही?[११] जर आम्ही इच्छूं तर त्यांना जमिनीत धसवून टाकूं; किंवा त्यांच्यावर आकाशाचे तुकडे पाडून टाकूं;[१२] खचित्च याच्यांत, पूर्ण धडा आहे, प्रत्येक त्या सेवकासाठी, जो (मनापासून अल्लाहकडे) वळतो. ⑨

وَلَقَدْ آتَيْنَا دَاوُودَ مِنَّا فَضْلًا ۖ يَا جِبَالُ أَوِّبِي مَعَهُ وَالطَّيْرَ ۖ وَأَلَنَّا لَهُ الْحَدِيدَ ﴿١٠﴾

आणि आम्ही दाऊद ला आपल्याकडून श्रेष्ठत्व दिले.[१३] हे पर्वतांनो ! त्याच्या बरोबर आवडीने (अल्लाहचे) पावित्र्य वर्णन करीत जा. आणि पक्ष्यांना सुद्धां.[१४] आणि आम्ही त्याच्यासाठी लोखंडाला नरम करून टाकले.[१५] ⑩

१) हे कयामत घडून येण्याचे कारण आहे; म्हणजे कयामत यासाठी येईल, आणि सर्व मनुष्यांना, अल्लाहतआला यासाठी जिवंत करील की, त्याने सदाचरणी लोकांना त्याच्या पुण्याचा मोबदला द्यावा. कारण मोबदला देण्यासाठीच त्याने हा दिवस ठेवला आहे. जर हा मोबदल्याचा दिवस नसेल, तर त्याचा अर्थ असा होईल की, पुण्यवान आणि पापी दोन्ही समान आहेत. आणि ही गोष्ट न्यायाच्या बिलकुल विरूद्ध आणि सेवकांवर विषेशत: पुण्यवान लोकांवर जुलूम होईल. ''वमा रब्बुका बिजल्लामिल्लिल अबीद आणि तुझा पालनकर्ता सेवकांवर जुलूम करणारा नाही)''

२) म्हणजे आमच्या त्या निशाण्यांना रद्द आणि खोटे ठरविले, ज्या आम्ही आमच्या पैगंबरांवर अवतरीत केल्या. 'मुआजिजीन' हे समजत असून सुद्धांकी, आम्ही त्याच्या पकडीपासून हतबल् होऊं; कारण की त्याची धारणा होती की, मरणा नंतर जेव्हा आम्ही मातीत मिसळून जाऊं, तर आम्ही कशाप्रकारे दुसऱ्यांदा जिवंत होऊन कोणाच्या समोर आपल्या केल्या सवरल्याचे उत्तर दायित्व स्वीकारूं? यांचे हे समजणे, जणूं या गोष्टीचे जाहीर करणे होते, की अल्लाहतआला आमची पकड करण्यावर समर्थच होणार नाही. यासाठी कयामतचे भय आम्हांस कांअसावे ?

३) येथे पहाण्याने अभिप्रेत, अंत:करणाने पहाणे, म्हणजे खात्रिशीर ज्ञान. निव्वळ डोळ्यांनी पाहणे नाही. ज्ञानवाल्यांनी अभिप्रेत, सहाबा किराम ﷺ किंवा ग्रंथधारक ईमानवाले किंवा सर्वच ईमानवाले आहेत. म्हणजे ईमानवाले या गोष्टीला जाणतात आणि त्याच्यावर विश्वास ठेवतात.....

४) म्हणजे ते हे पण जाणतात की, हे कुरआन करीम, त्या रस्त्याकडे मार्गदर्शन करते, जो त्या अल्लाहचा मार्ग आहे, जो ब्रम्हांडात सर्वांवर परम समर्थ आहे; आणि आपल्या सृष्टीत प्रशंसनीय आहे आणि तो मार्ग काय आहे ? एकेश्वरवादा (तौहिद) चा मार्ग; ज्याच्याकडे सर्व पैगंबर आपआपल्या लोकांना आमंत्रण देत राहिले.

५) हे ईमानवाल्यांच्या मुकाबल्यात परलोकाला नाकारण्याचे म्हणणे आहे; जे आपसांत त्यांनी एक दुसऱ्याला सांगितले.

६) याच्याने अभिप्रेत, हजरत मुहम्मद मुस्तफा सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत; जे त्यांच्याकडे अल्लाहचे पैगंबर बनून आले होते.

७) म्हणजे आश्चर्यकारक आणि विचित्र बातमी. समजण्यांस अयोग्य बातमी.

८) म्हणजे मेल्यानंतर जेव्हा तुम्ही मातीत मिसळून कण कण होऊन जाल, तुमचे जाहीर अस्तित्व नाहिसे होऊन जाईल; तुम्हास थडग्यापासून दुसऱ्यांदा जिवंत केले जाईल. आणि दुसऱ्यांदा तुम्हाला तेच रुप आणि चेहरे पट्टी, तुम्हांस बहाल करून देण्यांत येईल; ज्यांत तुम्ही पूर्वी होता. हे संभाषण त्यांनी आपसांत थट्टा आणि उपहास म्हणून केले.

९) म्हणजे दोन गोष्टींतून एक गोष्ट तर जरूर आहे की हा खोटे बोलत आहे; आणि अल्लाहकडून वह्य आणि पैगंबरीचा दावा, हे अल्लाहवर त्याचे खोटे कुभांड आहे. किंवा डोके फिरून गेले आहे, आणि वेडेपणांत अशा गोष्टी करीत आहे. ज्या बुद्धीला न पटणाऱ्या आहेत.

१०) अल्लाहतआलाने फर्माविले, गोष्ट अशी नाही, जशी हे कल्पना करीत आहे. किंबहुना खरी गोष्ट अशी आहे की, अक्कल व समज आणि वास्तविकतेला जाणून घेण्यापासून हे लोक असमर्थ आहेत. ज्यामुळे हे परलोकावर ईमान आणण्याच्या ऐवजी, त्याला नाकारत आहे. ज्याचा परिणाम परलोकातील कायमची शिक्षांआहे. आणि हे आज अशा बहकण्यांत पडले आहेत, जे सत्त्यापासून फारच दूर आहे.

११) म्हणजे याच्यावर मनन करीत नाही? अल्लाहतआला त्यांची कानउघाडणी करीत, फर्मावित आहे की, परलोकाला हे नाकारणे, आकाश आणि पृथ्वीच्या निर्माण करण्यांत, चिंतन न करण्याचा परिणाम आहे. नाही तर ते व्यक्तीत्व आकाशासारखी वस्तूं, ज्याची उंची आणि विस्तृतपणा वर्णन करण्या पलीकडे आहे. आणि पृथ्वी सारखी वस्तूं, जिची लांबी रूंदी पण समजण्याच्या पलीकडे आहे, निर्माण करूंशकते. म्हणूनच आपल्या निर्माण केलेल्या वस्तुंला दुसऱ्यांदा निर्माण करून देणे, आणि तिला दुसऱ्यांदा त्याच स्थितीत घेऊन येणे, ज्यांत ती पूर्वी होती. असे करणे कांअशक्य आहे ?

१२) म्हणजे हे महावाक्य दोन गोष्टींचा समावेश करते. एक अल्लाहच्या असीम सामर्थ्याचे वर्णन, जे आतां वर्णन करण्यांत आले. दुसरे, काफिरांकरीतां तंबी आणि भीती दाखविणे आहे, की जो अल्लाह आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीवर अशा प्रकारे समर्थ आहे की, त्यांच्यावर आणि त्यांच्या दर्म्यान असलेल्या प्रत्येक वस्तुंवर त्यांची ढवळाढवळ आणि प्रभाव आहे; तो जेव्हां इच्छील, त्यांच्यावर शिक्षा पाठवून, त्यांना नष्ट करूंशकतो. जमिनीत धसवूंन सुद्धां, ज्याप्रमाणे कारूनला धसविले. किंवा आकाशाचे तुकडे पाडून, ज्याप्रमाणे 'ऐका' वाल्यांना नष्ट करण्यांत आले.

१३) म्हणजे पैगंबरीच्या बरोबर राज्य, आणि कित्येक विशेष खुब्या त्यांना बहाल केल्यात.

१४) याच्यातून एक सुंदर आवाजाची देणगी पण होती. जेव्हां ते अल्लाहचे गुणगाण करत, तर दगडांचे कठीण पर्वत सुद्धांअल्लाहचे गुणगाण करण्यांत, व्यस्त होऊन जात. उडणारे पक्षी थांबून जात, आणि त्यांच्या बरोबर गुणगाण करूं लागत. 'अव्विबी' चा अर्थ आहे, पावित्र्य वर्णनाला पुन्हां म्हणा. म्हणजे पर्वत आणि पक्ष्यांना आम्ही सांगितले. म्हणून ते पण दाऊदाबरोबर पावित्र्य वर्णन करण्यांत दंग होऊन जात.

१५) म्हणजे लोखंडाला आगीत तापवून आणि हातोडीने ठोकल्याशिवाय, त्याला मेण मळलेले पीठ आणि ओल्या माती सारखे ज्याप्रमाणे इच्छित वांकवून घेत व आकार देत, आणि जे इच्छित ते बनवून घेत.

اَنِ اعْمَلْ سٰبِغٰتٍ وَّ قَدِّرْ فِی السَّرْدِ وَاعْمَلُوْا صَالِحًا ؕ اِنِّیْ بِمَا تَعْمَلُوْنَ بَصِیْرٌ ﴿۱۱﴾

**की तूं पुरी पुरी चिलखते बनीव; (१) आणि (कड्या) जोडण्यांत एक अंदाज ठेव. (२) तुम्ही सर्व सुकृत्ये करीत जा. (३) (लक्षांत ठेवा) मी तुमची कर्मे पहात आहे. ⑪**

وَلِسُلَیْمٰنَ الرِّیْحَ غُدُوُّهَا شَهْرٌ وَّ رَوَاحُهَا شَهْرٌ ۚ وَاَسَلْنَا لَهٗ عَیْنَ الْقِطْرِ ؕ وَمِنَ الْجِنِّ مَنْ یَّعْمَلُ بَیْنَ یَدَیْهِ بِاِذْنِ رَبِّهٖ ؕ وَمَنْ یَّزِغْ مِنْهُمْ عَنْ اَمْرِنَا نُذِقْهُ مِنْ عَذَابِ السَّعِیْرِ ﴿۱۲﴾

**आणि आम्ही वाऱ्याला सुलैमानच्या अधिन करून ठेवले की त्याची सकाळची चाल महिन्यापर्यंत होती. आणि संध्याकाळची चाल सुद्धा; (४) आणि आम्ही त्यांच्या करतां तांब्याचा झरा वाहवून दिला. (५) आणि त्याच्या पालनकर्त्याचे हुकमाने, काही जिन्नांत त्याच्या अधिन होऊन त्याच्या समोर काम करीत असत; आणि यांच्यातून जो पण आमच्या हुकुमाकडून तोंड फिरवील, त्याला आम्ही भडकत्या आगीच्या शिक्षेची गोडी चाखवूं (६) ⑫**

یَعْمَلُوْنَ لَهٗ مَا یَشَآءُ مِنْ مَّحَارِیْبَ وَ تَمَاثِیْلَ وَجِفَانٍ كَالْجَوَابِ وَقُدُوْرٍ رّٰسِیٰتٍ ؕ اِعْمَلُوْۤا اٰلَ دَاوٗدَ شُكْرًا ؕ وَقَلِیْلٌ مِّنْ عِبَادِیَ الشَّكُوْرُ ﴿۱۳﴾

**जे काही सुलैमान इच्छित ते जिन्नात तयार करून देत असत. उदाहरणार्थ किल्ले आणि पुतळे आणि हौदासारख्या पराती आणि चुलीवर जमलेल्या मजबूत डेगा. (७) हे दाऊदच्या वंशानो! याच्या आभार प्रदर्शनार्थ सुकृत्ये करा. माझ्या सेवकांमधून आभार मानणारे सेवक, फारच कमी असतात. ⑬**

१) म्हणजे पूर्ण लांब चिलखत बनीव, जे लढणाऱ्याच्या पूर्ण शरीराला चांगल्या रित्या झांकून घ्यावे; आणि शत्रुच्या वारांपासून सुरक्षित ठेवावे.
२) कारण की लहान मोठी न व्हावी, किंवा कडक किंवा नरम होऊं नये. म्हणजे कड्यांच्या जोडण्यांत खिळे इतके बारिक नसावे की सांधे हलत रहावे आणि त्यांच्यात ताठरपणा आणि स्थिरता राहूं नये. आणि ते खिळे इतके जाड नसावे की, त्याला तोडूनच टाकावे किंवा ज्यामुळे त्याचा घेरा आखुड होऊन जावा. आणि त्याला घातले जाऊं शकूं नये. या चिलखत बनविण्याच्या कारागिरी बाबतीत, ह.दाऊद عليه السلام ला सूचना देण्यांत आल्या.
३) म्हणजे या देणग्यांच्या बदल्यांत, सुकृत्ये करीत रहा. कारण की माझे कार्मिक आभार पण मानले जावेत. याच्याने ठाऊक झाले की, ज्याला अल्लाहतआला ऐहिक देणग्या बहाल करेल, त्याला याच हिशेबाने, अल्लाहचे आभार पण मानले पाहिजेत. आणि आभार मानण्यांत मूळ ही गोष्ट आहे की, देणगीदात्याला खूष ठेवण्याचा भरपूर प्रयत्न केला जावा. म्हणजे त्याचे आज्ञापालन केले जावे. आणि आज्ञाभंजनापासून वांचले जावे.
४) म्हणजे ह.सुलैमान عليه السلام राज्याच्या सरदार आणि लष्करासह, महासिंहासनावर बसून जात, आणि जिकडे त्यांचा हुकूम होईल तिकडे वारा त्याला, इतक्या वेगाने घेऊन जाई की, एक महिन्याएवढा प्रवास सकाळपासून दुपारपर्यंत एकाचवेळी पार पाडला जाई आणि मग अशाच प्रकारे दुपारपासून रात्रीपर्यंत एक महिन्या पर्यंतचा प्रवास पार पडून जात असे. अशा प्रकारे एका दिवसांत दोन महिन्यात इतका प्रवास पार पडून जाई.
५) म्हणजे ज्याप्रमाणे ह.दाऊद عليه السلام करीतां लोखंड नरम करून देण्यांत आले होते, ह.सुलैमान عليه السلام साठी, आम्ही तांब्याचा झरा वाहवून दिला होता की, तांब्याच्या धातूपासून त्यांनी जे पाहिजे ते बनवून घ्यावे.
६) बहुतेक भाष्यकारांजवळ ही शिक्षा क्यामतच्या दिवशी दिली जाईल. परंतु, काहींच्या जवळ ही या जगांतली शिक्षा आहे. ते म्हणतात की, अल्लाहतआलाने, एक देवदूत त्यांच्यावर नेमला होता. ज्याच्या हातांत आगीचा सोटा असे. जो जिन्न ह.सुलैमान عليه السلام च्या हुकुमाला पाळत नसे, देवदूत त्या सोट्याने त्याला मारत असे. ज्यामुळे तो जळून भस्म होऊन जाई. (फत्हुल कदीर)
७) 'महारिब' महराबचे अनेकवचन आहे. उंच जागा, किंवा चांगली इमारत. अर्थ आहे उंच महाल, आलीशान इमारती किंवा मशीदी व उपासना गृहे. 'तमाशील' तिमशाल चे अनेकवचन आहे. चित्र किंवा चित्रे, ज्यांच्यात जीव नाही अशा वस्तुंची असत. काही म्हणतात की पैगंबर आणि सदाचरणी लोकांची चित्रे मशिदींमध्ये बनविली जात असत की, त्यांना पाहून लोकांनी पण उपासना करावी. हा अर्थ अशा स्वरूपांत बरोबर आहे, जेव्हा हे मान्य केले जाईल की, ह.सुलैमान عليه السلام च्या धर्मशास्त्रांत (शरिअत) चित्रे काढण्याची परवानगी होती. जे बरोबर नाही. तथापि इस्लाममध्ये तर, फारच सक्तीने याला मना करण्यांत आले आहे. 'जिफान' 'जफ्नत्ता' चे अनेकवचन आहे. म्हणजे आवड 'जवाब' 'जाबियता' चे अनेकवचन आहे. हौद ज्याच्यांत पाणी जमा केले जाते. म्हणजे हौदासारख्या मोठमोठ्या पराती. कुदूर, डेगा रासियात एकाच जागी जमवून ठेवलेली. असे म्हणतात की या डेगा डोंगरांना कोरून बनविल्या जात असत. ज्याने उघड आहे की, त्यांना उचलून इकडे तिकडे घेऊन जाणे शक्य होत नव्हते. यांच्यात एकाच वेळी हजारो लोकांचे जेवण शिजविले जात असे. ही सर्व कामे जिन्नांत करीत असत.

فَلَمَّا قَضَيْنَا عَلَيْهِ الْمَوْتَ مَا دَلَّهُمْ عَلَىٰ مَوْتِهِ إِلَّا دَابَّةُ الْأَرْضِ تَأْكُلُ مِنسَأَتَهُ ۖ فَلَمَّا خَرَّ تَبَيَّنَتِ الْجِنُّ أَن لَّوْ كَانُوا يَعْلَمُونَ الْغَيْبَ مَا لَبِثُوا فِي الْعَذَابِ الْمُهِينِ ﴿١٤﴾

**मग आम्ही जेव्हां त्यांच्यावर मृत्युचा हुकूम पाठवून दिला तर त्याचा पत्ता जिन्नातांना कोणी दिला नाही; शिवाय वाळवीच्या जी यांच्या काठीला खात होती; मग जेव्हां सुलैमान खाली पडले, तेव्हा जिन्नतांनी जाणून घेतले की, ते जर अदृष्टाचे जाणणारे असते, तर या अपमानजनक आपत्तीत राहिले नसते.** (१) (१४)

لَقَدْ كَانَ لِسَبَإٍ فِي مَسْكَنِهِمْ آيَةٌ ۖ جَنَّتَانِ عَن يَمِينٍ وَشِمَالٍ ۖ كُلُوا مِن رِّزْقِ رَبِّكُمْ وَاشْكُرُوا لَهُ ۚ بَلْدَةٌ طَيِّبَةٌ وَرَبٌّ غَفُورٌ ﴿١٥﴾

**'सबा' च्या लोकांकरीता, आपल्या वस्तीमध्ये (अल्लाहच्या सामर्थ्याची) निशाणी होती.** (२) **त्यांच्या उजवी आणि डावीकडे दोन बागब होत्या.** (३) **आपल्या पालनकर्त्याने दिलेली अन्नसंपत्ती खा;** (४) **आणि त्याचे आभार माना;** (५) **उत्कृष्ट, शहर** (६) **आणि क्षमाकर्ता पालनकर्ता** (७) (१५)

فَأَعْرَضُوا فَأَرْسَلْنَا عَلَيْهِمْ سَيْلَ الْعَرِمِ وَبَدَّلْنَاهُم بِجَنَّتَيْهِمْ جَنَّتَيْنِ ذَوَاتَيْ أُكُلٍ خَمْطٍ وَأَثْلٍ وَشَيْءٍ مِّن سِدْرٍ قَلِيلٍ ﴿١٦﴾

**परंतु त्यांनी (आमच्या हुकुमाकडून) तोंड फिरविले; तेव्हांआम्ही त्यांच्यावर जोराचा जलप्रलय पाठवून दिला; आणि आम्ही त्यांच्या (हिरव्यागार) बागांच्या बदल्यांत दोन अशा बागा दिल्या, जे बेचव फळांवाले आणि भरपूर सुरूंची, आणि काही बोरांची झाडे होती.** (८) (१६)

१) ह.सुलैमान عليه السلام च्या काळांत, जिन्नांताच्या बाबतीत मशहूर होऊन गेले होते की, हे अदृष्टाच्या गोष्टी जाणतात. अल्लाहतआलाने ह.सुलैमान عليه السلام च्या मृत्यु मार्फत, या श्रद्धेला खोटे ठरवून दिले.

२) 'सबा' तोच सुख संपन्न मुलुख होता, ज्याची 'सबाची राणी' प्रसिद्ध आहे. जी, ह.सुलैमान عليه السلام च्या काळांत मुसलमान होऊन गेली होती. लोकांच्याच नांवावर देशाचे नांव पण सबा होते. आजकाल यमनच्या नांवावर हा इलाखा प्रसिद्ध आहे. हा फार सुखसंपन्न देश होता. हा देश सामुद्रिक आणि भूमी अंतर्गत व्यापारासाठी पण प्रसिद्ध होता. आणि शेती आणि बागाईतसाठी पण प्रसिद्ध होता. आणि या दोन्हीही गोष्टी, कोण्या देश आणि तेथील लोकांच्या सुसंपन्नतेला कारणीभूत असतात. याच धनसंपत्तीच्या विपुलतेला, येथे अल्लाहच्या सामर्थ्याची निशाणी संबोधण्यात आले आहे.

३) असे म्हणतात की, शहराच्या दोन्हीकडे डोंगर होते. ज्यांच्यातून झरे आणि नाल्यांचे पाणी वाहून शहरांत येत असे. त्यांच्या सत्ताधिशांनी डोंगराच्या दर्म्यान बंधारे बांधून दिले; त्याच प्रमाणे तेथे बागा पण लावून देण्यांत आल्या. ज्याच्याने पाण्याचा प्रवाह पण स्थिर होऊन गेला; आणि बागांना पण पाणी मिळण्याचे एक नैसर्गिक साधन प्राप्त होऊन गेले. याच बागांना उजवीकडे डावीकडे दोन बागांनी संबोधण्यात आले आहे. काही म्हणतात की, 'जन्नतैन' ने दोन बाग नाही, किंबहुना उजवीकडच्या आणि डावीकडच्या दोन बाजू अभिप्रेत आहेत. आणि अर्थ बागांची बहुतायता आहे. की जेथेही दृष्टी टाकावी, बाग, हिरवीगार मैदाने, सुपीक जमीनच दृष्टीस पडत होती. (फत्हुल कदीर)

४) हे त्या पैगंबरांच्या मार्फत सांगण्यात आले, किंवा अर्थ त्या देणग्यांचे वर्णन आहे. ज्या त्यांना बहाल करण्यांत आल्या होत्या.

५) म्हणजे दात्याचे आणि उपकार कर्त्याचे आभार माना. आणि त्याच्या आज्ञाभंगापासून वांचा.

६) म्हणजे भरपूर बागांमुळे, आणि फळांच्या विपुलतेने हे शहर उत्कृष्ट आहे. असे म्हणतात की, चांगल्या हवा पाण्यामुळे हे शहर माशा, डास आणि अशा प्रकारच्या दुसऱ्या त्रासदायक प्राण्यांपासून सुद्धां मुक्त होते. वल्लाहु अअ्लम!

७) म्हणजे जर तुम्ही अल्लाहचे आभार मानत राहाल, तर तो तुमचे अपराध पण क्षमा करून टाकेल. याचा अर्थ हा पण झाला की, मनुष्याने तौबा करीत रहावे, तर मग गुन्हे, सर्वांच्या नष्ट होण्याला आणि देणग्या काढून घेण्याला कारणीभूत होत नाही. किंबहुना अल्लाहतआला क्षमादानाने आणि सेवकांच्या गुन्ह्यांकडे दुर्लक्ष करतो.

८) म्हणजे त्यांनी डोंगराच्या दर्म्यान बंधारे बांधून पाणी जे अडविले होते आणि त्याला शेतीसाठी आणि फळांच्या बागांसाठी उपयोगांत आणित होते; आम्ही फार जोराच्या पुरामुळे त्या बंधाऱ्यांना तोडून टाकले. आणि सुपिक आणि फळे देणाऱ्या बागांना, अशा बागांमध्ये बदलून दिले, ज्यांच्यात फक्त नैसर्गिक काटेरी झाडे झुडपे राहतात. त्यांच्यात प्रथम तर काही फळे लागत नाही, आणि कोणात लागले सुद्धांतर फारच कडू बेचव, ज्यांना कोणी खाऊंही शकत नाही. तथापि काही बोरांची झाडे होती. ज्यांच्यात पण काटे जास्त आणि बोरे कमी होती. 'अरिम' 'अरमतून' चे अनेकवचन आहे. धरण किंवा बंधारा म्हणजे असे जोराचे पाणी पाठविले, ज्याने या बंधाऱ्यात भगदाड पाडून टाकले. आणि पाणी शहरात पण घुसून गेले; ज्यामुळे त्यांची घरे बुडून गेलीत. आणि बागांना पण उजाडून वैराण करून टाकले. हे धरण 'सद्दे मआरिब' या नांवाने प्रसिद्द आहे.

ذٰلِكَ جَزَيْنٰهُمْ بِمَا كَفَرُوْا ۭ وَهَلْ نُجٰزِيْٓ اِلَّا الْكَفُوْرَ ﴿١٧﴾

आम्ही त्यांच्या कृतघ्नपणाचा हा बदला त्यांना दिला. आम्ही अशी कडक शिक्षा मोठमोठ्या कृतघ्न लोकांनाच देत असतो. (१७)

وَجَعَلْنَا بَيْنَهُمْ وَبَيْنَ الْقُرَى الَّتِيْ بٰرَكْنَا فِيْهَا قُرًى ظَاهِرَةً وَّقَدَّرْنَا فِيْهَا السَّيْرَ ۭ سِيْرُوْا فِيْهَا لَيَالِيَ وَاَيَّامًا اٰمِنِيْنَ ﴿١٨﴾

आणि आम्ही त्यांच्यात आणि त्यांच्या वस्त्यांच्या दर्म्यान, ज्यांच्यांत आम्ही बरकत देऊन ठेवली होती, काही वस्त्या आणखी ठेवल्या, ज्या रस्त्यांवरून दिसून येत होत्या. [१] आणि त्यांत चालण्याच्या हद्दी आंखून दिल्या होत्या. [२] यांच्यात रात्री आणि दिवसा सुखरुप चालत फिरत रहा. [३] (१८)

فَقَالُوْا رَبَّنَا بٰعِدْ بَيْنَ اَسْفَارِنَا وَظَلَمُوْٓا اَنْفُسَهُمْ فَجَعَلْنٰهُمْ اَحَادِيْثَ وَمَزَّقْنٰهُمْ كُلَّ مُمَزَّقٍ ۭ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّكُلِّ صَبَّارٍ شَكُوْرٍ ﴿١٩﴾

परंतु, त्यांनी पुन्हा प्रार्थना केली की, हे आमच्या पालनकर्त्या ! तूंआमच्या प्रवासांत लांब लांबचे पल्ले ठेव; [४] कारण की स्वत: त्यांनी, आपल्या हाताने, आपले वाईट केले, म्हणून आम्ही त्यांना, (मागील) कहाण्यांच्या स्वरूपांत करून टाकले; [५] आणि आम्ही त्यांच्या धज्ज्या उडवून टाकल्या. [६] नि:संशय प्रत्येक सहनशिल आणि कृतज्ञता व्यक्त करणाऱ्या करितां, या प्रकरणांत मोठेच धडे आहेत (१९)

وَلَقَدْ صَدَّقَ عَلَيْهِمْ اِبْلِيْسُ ظَنَّهٗ فَاتَّبَعُوْهُ اِلَّا فَرِيْقًا مِّنَ الْمُؤْمِنِيْنَ ﴿٢٠﴾

आणि शैतानाने, त्यांच्या बाबतीत जो विचार करून ठेवला होता, त्याला खरे करून दाखविले; हे लोक सर्वच्या सर्व त्याच्या आज्ञांकीत होऊन गेले, शिवाय ईमानवाल्याच्या एका समूहाने (२०)

१) बरकतवाल्या वस्त्यांनी अभिप्रेत सीरियाच्या वस्त्या आहेत. म्हणजे आम्ही सबा (यमन) आणि सीरियाच्या दर्म्यान, रस्त्याच्या कडेला वस्त्या वसविल्या होत्या. काहींनी 'जाहिरत्न' चा अर्थ, 'मुतवासिलतन्' एक दुसऱ्याला लागून असलेल्या आणि क्रमाक्रमाने असा केला आहे. भाष्यकारांनी या वस्तीची संख्या, चार हजार सातशे दाखविली आहे. हा तो व्यापारी मुख्य रस्ता होता, जो एक सारखा वसलेला होता. सोबत सामान घेण्याची आवश्यकता पडत नव्हती. दुसरे उजाड अवस्थेमुळे, लुटमार आणि रक्तपाताची भीती असते, ती त्यांना नव्हती.

२) म्हणजे एका वस्तीपासून, दुसऱ्या वस्तीपर्यंत, अंतर निश्चित आणि ठाऊक होते. आणि या अंदाजाने ते आपला प्रवास सहज सुलभतेने पार पाडीत असत. उदाहरणार्थ सकाळी प्रवासाला सुरवात करीत, तर दुपारपर्यंत कोण्या वस्तीजवळ, पोहचून जात. तेथे जेवण करून, कैलुला (वामकुक्षी) करीत आणि मग पुन्हां प्रवासाला सुरवात करीत; तर रात्री कोण्या वस्तीत पोहचून जात.

३) हे प्रत्येक प्रकारच्या धोक्यापासून सुरक्षित आणि प्रवासात घ्यावयाच्या सामानाच्या श्रमाने बेफिकीर होऊन जाण्याचे वर्णन आहे की रात्र आणि दिवसाच्या कुठल्याही घटकेला तुम्ही प्रवास करूं इच्छाल, तर खुशाल करा ! न, जीव व मालमत्तेच्या हानीची काही भीती आणि न रस्त्याकरीतां प्रवासाचा सामान (शिदोरी) सोबत घेण्याची आवश्यकता.

४) म्हणजे ज्या प्रमाणे लोक प्रवासाचा त्रास, धोके आणि उन्हाळ्या हिवाळ्याच्या तिव्रतेची चर्चा करीत असतात, आमचे प्रवास पण असेच लांब लांबचे करून दे ! सतत वस्त्यांच्या ऐवजी, दर्म्यानमध्ये सुनसान व विराण जंगले आणि वाळवंटातून आम्हासं पार पडावे लागावे. उन्हाळ्यांत उन्हाची तिव्रता आणि थंडीत झोंबणारे वारे यांनी आम्हास परेशान करावे. आणि रस्त्यांत भूक आणि तहान आणि ऋतुमानांच्या तिव्रतेपासून वांचण्याकरीता आम्हाला प्रवासातील सामानाची पण व्यवस्था करावी लागावी. त्यांची ही दुआ अशा प्रकारे केलेली आहे, जसे बनी इस्राईलने मन्न आणि सल्वा आणि दुसऱ्या सवलतींच्या मुकाबल्यांत डाळी आणि भाज्यांची मागणी केली होती. किंवा मग तोंडाने सांगितल्याशिवाय त्यांची ही दुआ होती.

५) म्हणजे त्यांना अशा प्रकारे नाहीसे केले की, त्यांच्या नष्ट होण्याचा किस्सा, लोकांच्या तोंडी राहून गेला. आणि बैठका आणि सभांचा बोलण्याचा विषय होऊन गेला.

६) म्हणजे त्यांना वेगवेगळे आणि पसरवून टाकले. म्हणून सबामध्ये वसलेली प्रसिद्ध घराणी, वेगवेगळ्या ठिकाणी जाऊन वसली. कोणी यसरब आणि मक्केत आला; कोणी सीरियाच्या इलाख्यांत चालला गेला. कोणी कुठे, आणि कोणी कुठे.

وَمَا كَانَ لَهٗ عَلَيۡهِمۡ مِّنۡ سُلۡطٰنٍ اِلَّا لِنَعۡلَمَ مَنۡ يُّؤۡمِنُ
بِالۡاٰخِرَةِ مِمَّنۡ هُوَ مِنۡهَا فِىۡ شَكٍّ‌ؕ وَرَبُّكَ عَلٰى كُلِّ شَىۡءٍ
حَفِيۡظٌ ﴿۲۱﴾

**आणि शैतानाचा त्यांच्यावर काही जोर (आणि दाब) नव्हतां, परंतु यासाठी की, आम्ही त्या लोकांना, जे परलोकावर विश्वास ठेवतात, त्या लोकांपासून वेगळे जाहीर करून टाकावे, जे याच्याकडून संशयात आहे; आपला पालनकर्ता प्रत्येक वस्तुंचा सांभाळकर्ता आहे. (२१)**

قُلِ ادۡعُوا الَّذِيۡنَ زَعَمۡتُمۡ مِّنۡ دُوۡنِ اللّٰهِ‌ۚ لَا يَمۡلِكُوۡنَ
مِثۡقَالَ ذَرَّةٍ فِى السَّمٰوٰتِ وَلَا فِى الۡاَرۡضِ وَمَا لَهُمۡ
فِيۡهِمَا مِنۡ شِرۡكٍ وَّمَا لَهٗ مِنۡهُمۡ مِّنۡ ظَهِيۡرٍ ﴿۲۲﴾

**(आपण) सांगून द्या की, अल्लाहशिवाय ज्यांचा ज्यांचा तुम्हास भ्रम आहे. त्यांना बोलावून घ्या;[१] न यांच्यातून कोणाला आकाशांत आणि पृथ्वीत एका कणाचा अधिकार आहे,[२] न त्यांचा याच्यांत काही वाटा[३] आहे. न त्यांच्यातून कोणी अल्लाहचा मददगार आहे.[४] (२२)**

وَلَا تَنۡفَعُ الشَّفَاعَةُ عِنۡدَهٗۤ اِلَّا لِمَنۡ اَذِنَ لَهٗ‌ ؕ حَتّٰٓى
اِذَا فُزِّعَ عَنۡ قُلُوۡبِهِمۡ قَالُوۡا مَاذَا ۙ قَالَ رَبُّكُمۡ‌ ؕ قَالُوا
الۡحَـقَّ‌ ۚ وَهُوَ الۡعَلِىُّ الۡكَبِيۡرُ ﴿۲۳﴾

**आणि शिफारस पण त्याच्या जवळ कामा येत नाही. त्यांच्या शिवाय कोणी, ज्यांना परवानगी दिली जाईल.[५] येथपावेतो की जेव्हां त्यांच्या मनांतून हैबत दूर करून दिली जाते, तेव्हां विचारतात तुमच्या पालनकर्त्याने काय हुकूम दिला? ते उत्तर देतात की, सत्य तेच सांगितले; आणि तो[६] महिमाशाली आणि थोर आहे. (२३)**

قُلۡ مَنۡ يَّرۡزُقُكُمۡ مِّنَ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ‌ؕ قُلِ اللّٰهُ‌ۙ
وَاِنَّاۤ اَوۡ اِيَّاكُمۡ لَعَلٰى هُدًى اَوۡ فِىۡ ضَلٰلٍ مُّبِيۡنٍ ﴿۲۴﴾

**(त्यांना) विचारा की तुम्हास आकाश आणि पृथ्वीतून कोण अन्नसंपत्ती देतो? (स्वत:च) सांगा की अल्लाहतआला (ऐका!) आम्ही किंवा तुम्ही एक तर खचित्‌च सन्मार्गावर आहोत, किंवा स्पष्ट बहकलेले आहोत[७] (२४)**

१) म्हणजे ज्यांना ज्यांना तुम्ही उपास्य समजतात.

२) म्हणजे त्यांना न भलाईवर काही अधिकार आहे, न वाईटावर; कोणाला फायदा पोहचण्यावर सामर्थ्य आहे, न नुकसानापासून वांचविण्याचे; आकाश आणि पृथ्वीचा उल्लेख सर्वसाधारणासाठी आहे.

३) न निर्मितीत, न मालकीत न फेरबदल करण्यांत.

४) जो कुठल्याही बाबतीत अल्लाहची मदत करीत असेल. किंबहुना अल्लाहतआलाच दुसऱ्या कोणाला सरकतदार केल्याशिवाय सर्व अधिकारांचा स्वामी आहे. आणि कोणाच्या मदती शिवायच सर्व कामे करीत असतो.

५) 'ज्यांच्यासाठी परवानगी मिळून जाईल.' चा अर्थ आहे, पैगंबर आणि देवदूत वगैरे; म्हणजे हेच शिफारस करू शकतील, आणखी कोणी नाही. कारण की आणखी कोणाची शिफारस फायदेदायक होईल न त्यांना परवानगीच मिळेल. दुसरा अर्थ आहे, शिफारस करण्यास पात्र म्हणजे पैगंबर, देवदूत आणि सदाचरणी लोक, फक्त त्यांच्याच बाबतीत शिफारस करू शकतील जे शिफारशीला पात्र असतील; कारण की, अल्लाहकडून फक्त त्यांच्याच बाबतीत शिफारस करण्याची परवानगी मिळेल, कोण्या दुसऱ्यासाठी नाही. (फत्हूल कदीर) अर्थ हा झाला की, पैगंबर देवदूत आणि सदाचरणी लोकांशिवाय तेथे कोणी शिफारशी करूंशकणार नाही. आणि हे लोक पण शिफारस ईमानवाल्या गुन्हेगारांच्या करतांच करूंशकतील. काफिर, मुशरिक लोक आणि अल्लाहच्या बंडखोरांसाठी नाही. कुरआन करीमने दुसऱ्या ठिकाणी या दोन्ही मुद्द्यांचा खुलासा करून दिला आहे. ''कोण आहे, जो त्याच्या परवानगीशिवाय त्याच्या समोर शिफारस करूंशकेल ?'' (सू.बकर:२५५) ''ते कोणाची पण शिफारस करीत नाहीत, शिवाय त्यांच्या, ज्यांच्याशी अल्लाह खूष असेल.'' (सू.अंबिया - २८)

६) याची निरनिराळी भाष्ये करण्यात आली आहेत. इब्ने जरीर आणि इब्ने कसीरने हदीसच्या प्रकाशात, याचे हे भाष्य सांगितले आहे की, जेव्हा अल्लाहतआला कोण्या कामाबाबत वह्य अवतरीत करतो, तेव्हा आकाशांत असलेले देवदूत, दहशतीने आणि भीतीने थरथर कांपतात, आणि त्यांच्यावर बेशुद्ध होण्याची अवस्था येऊन जाते. शुद्धीवर आल्यावर ते विचारतात तेव्हा, 'अर्ष' वाले देवदूत दुसऱ्या देवदुतांना आणि ते आपल्या पेक्षा खाली असलेल्या देवदुतांना सांगतात आणि अशा प्रकारे बातमी पहिल्या आकाशाच्या देवदुतांपर्यंत पोहचून जाते. (इब्ने कसीर) 'फुज्जीअ' म्हणजे जेव्हा हैबत दूर करून दिली जाते.

७) उघड गोष्ट आहे, बहकलेला तोच असेल, जो अशा वस्तूंना उपास्य समजतो, ज्यांच्या आकाशांतून आणि पृथ्वीतून अन्नसंपत्ती पुरविण्यावर काही वांटा नाही. न ते पाऊस पाडूंशकतात, न काही उगवूंशकतात. म्हणून सत्त्यावर खरोखर एकेश्वरवादी (अहले तौहिद) च आहे. न की, दोघे.

قُلْ لَّا تُسْـَٔلُوْنَ عَمَّاۤ اَجْرَمْنَا وَلَا نُسْـَٔلُ عَمَّا تَعْمَلُوْنَ ﴿۲۵﴾

सांगून द्या की, आम्ही केलेल्या गुन्ह्यांच्या बाबतीत, तुम्हांस काही विचारले जाणार नाही; न तुमच्या कर्माची विचारपूस आम्हांस केली जाईल ㉕

قُلْ یَجْمَعُ بَیْنَنَا رَبُّنَا ثُمَّ یَفْتَحُ بَیْنَنَا بِالْحَقِّ ؕ وَهُوَ الْفَتَّاحُ الْعَلِیْمُ ﴿۲۶﴾

त्यांना सांगून द्या की, आम्हांसर्वांस आमचा पालनकर्ता एकत्र गोळा करून मग आमच्यांत न्याय पुरस्कर निवाडे करून टाकील. (१) तो निवाडे करणारा आणि ज्ञानी आहे. ㉖

قُلْ اَرُوْنِیَ الَّذِیْنَ اَلْحَقْتُمْ بِهٖ شُرَكَآءَ كَلَّا ؕ بَلْ هُوَ اللّٰهُ الْعَزِیْزُ الْحَكِیْمُ ﴿۲۷﴾

सांगून द्या की, बरे ! मला पण तर त्यांना दाखवून द्या, ज्यांना तुम्ही अल्लाहचा सरकतदार ठरवून त्याच्या बरोबर मिळवत आहांत; असे मुळीच (२) नाही ! किंबहुना तोच अल्लाह सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. ㉗

وَمَاۤ اَرْسَلْنٰكَ اِلَّا كَآفَّةً لِّلنَّاسِ بَشِیْرًا وَّنَذِیْرًا وَّلٰكِنَّ اَكْثَرَ النَّاسِ لَا یَعْلَمُوْنَ ﴿۲۸﴾

आणि आम्ही आपणांस सर्व लोकांसाठी शुभवर्तमान ऐकविणारा आणि धमकाविणारा बनवून पाठविले आहे; होय! (हे बरोबर आहे) की, बहुतेक लोक जाणत नाही. (३) ㉘

وَیَقُوْلُوْنَ مَتٰی هٰذَا الْوَعْدُ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِیْنَ ﴿۲۹﴾

विचारतात की, तो वायदा केव्हा आहे? खरे आहात तर सांगून टाका. (४) ㉙

१) म्हणजे याच्याप्रमाणे मोबदला देईल. सुकृत्ये करणाऱ्यांस स्वर्गांत, आणि कुकृत्ये करणाऱ्यांस नरकाग्नीत दाखल करील.

२) म्हणजे न, त्याच्या सारखा कोणी आहे, न त्याच्यासमान किंबहुना तो प्रत्येक वस्तुंवर परम समर्थ आहे. आणि त्याच्या प्रत्येक कामांत आणि म्हणण्यांत शहाणपण आहे.

३) या महावाक्यांमध्ये, अल्लाहतआलाने नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सर्वांसाठीच्या पैगंबरीचे वर्णन केले आहे की, आपण सल्ल.ला संपूर्ण मानव जातीसाठी सन्मार्ग दाखविणारा आणि मार्गदर्शक बनवून पाठविण्यांत आलेले आहे. दुसरे हे सांगितले की, परंतु बहुतेक आपल्या इच्छे आणि प्रयत्नांनी सुद्धां, ईमानापासून वंचित् राहतील. या दोन्ही गोष्टींचा खुलासा आणखी पण दुसऱ्या ठिकाणांवर केला गेला आहे. उदाहरणार्थ आपल्या पैगंबरीच्या संदर्भात सांगितले, ''अहो लोकांनो ! मी तुम्हांसर्वांकडे त्या अल्लाहकडून पाठविलेला आहे.'' (सू.अअ्राफ-१५८) ''फारच शुभकारक आहे तो अल्लाहतआला ज्याने आपल्या सेवकांवर फरक करणारे (कुरआन) अवतरीत केले की, त्याने तमाम लोकांकरीतां, सावध करणारा होऊन जावे.'' (सू.फुरकान-१) एका हदीस मध्ये आपण ﷺ नी सांगितले, ''मला पांच गोष्टी अशा दिल्या गेल्या आहेत, ज्या माझ्यापूर्वी कोण्या पैगंबराला दिल्या गेल्या नाही १) एक महिन्याच्या प्रवासा इतक्या लांबून शत्रुच्या मनांत माझी हैबत बसविण्याने, माझी मदत करण्यांत आली आहे. २) संपूर्ण जमीन माझ्यासाठी मशीद आणि पाक आहे, जेथे पण नमाजीचा वेळ होऊन जाईल, माझ्या उम्मतीने तेथे नमाज पढावी. ३) गनीमतची संपत्ती माझ्यासाठी विहीत (हलाल) करून देण्यांत आली जी पूर्वींच्या पैगंबरासाठी हलाल नव्हती. ४) मला शिफारस करण्याचा हक्क देण्यांत आला आहे. (५) पहिले पैगंबर फक्त आपल्या लोकांकडे पाठविले जात असत. मला विश्वाच्या तमाम लोकांकडे पैगंबर बनवून पाठविण्यांत आले आहे.'' (स.बुखारी,स.मुस्लिम) एका आणखी हदीसमध्ये सांगितले, ''मला गोरे आणि काळे सर्वांकडे पाठविले गेले आहे.'' (स.मुस्लिम, किताबुल मसाजिद) गोरे आणि काळ्यांनी अभिप्रेत, काहींनी जिन्न आणि मनुष्ये, आणि काहींनी अरब व अरबेतर घेतले आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात, दोन्हीही अर्थ बरोबर आहेत. अशाच प्रकारे बहुतेक लोकांचे न जाणणे, आणि बहकण्याचा खुलासा केला. ''आपली इच्छा असून सुद्धां बहुतेक लोक ईमान आणणार नाही.'' (सू.यूसुफ-१०३) ''जर आपण (सल्ल.) जमीनवाल्यांच्या बहुतायतेच्या मागे चालाल (अनुकरण कराल) तर ते आपणांस बहकवून टाकतील'' (सू.अन्आम-११६) ज्याचा अर्थ हाच झाला की, बहुतायता बहकलेल्यांची आहे.

४) हे ते उपहास म्हणून विचारत असत. कारण की इचे (कयामतचे) घडून येणे त्यांच्याजवळ असंभव आणि अशक्य होते.

قُلْ لَّكُمْ مِّيْعَادُ يَوْمٍ لَّا تَسْتَاْخِرُوْنَ عَنْهُ سَاعَةً وَّلَا تَسْتَقْدِمُوْنَ ﴿٣٠﴾

उत्तर द्या की, वायद्याचा दिवस बरोबर निश्चित आहे; ज्यापासून एक घटका न तुम्ही मागे सरकूं शकतात, न पुढे जाऊं शकतात[१] ३०

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَنْ نُّؤْمِنَ بِهٰذَا الْقُرْاٰنِ وَلَا بِالَّذِيْ بَيْنَ يَدَيْهِ ۭ وَلَوْ تَرٰٓى اِذِ الظّٰلِمُوْنَ مَوْقُوْفُوْنَ عِنْدَ رَبِّهِمْ ښ يَرْجِعُ بَعْضُهُمْ اِلٰى بَعْضِ ۨ الْقَوْلَ ۚ يَقُوْلُ الَّذِيْنَ اسْتُضْعِفُوْا لِلَّذِيْنَ اسْتَكْبَرُوْا لَوْلَآ اَنْتُمْ لَكُنَّا مُؤْمِنِيْنَ ﴿٣١﴾

आणि काफिरांनी म्हटले की, आम्ही न तर या कुरआनाला मानतो, न याच्या पूर्वीच्या पुस्तकांना;[२] हे पहाणाऱ्या! की, जर तूं या जालिमांना त्यावेळी पाहतांस, जेव्हा की ते आपल्या पालनकर्त्या पुढे उभे राहून एक दुसऱ्यावर आरोप करीत असतील. [३] कनिष्ठ दर्जाचे लोक, उच्च दर्जाच्या लोकांना म्हणतील,[४] जर तुम्ही नसतांतर, आम्ही मुसलमान असतो[५] ३१

قَالَ الَّذِيْنَ اسْتَكْبَرُوْا لِلَّذِيْنَ اسْتُضْعِفُوْٓا اَنَحْنُ صَدَدْنٰكُمْ عَنِ الْهُدٰى بَعْدَ اِذْ جَاۗءَكُمْ بَلْ كُنْتُمْ مُّجْرِمِيْنَ ﴿٣٢﴾

हे मोठे लोक त्या लहान लोकांना उत्तर देतील की, काय तुमच्या जवळ सरळमार्ग येऊन चुकल्यानंतर, आम्ही तुम्हांस यापासून अडविले होते? (नाही!) किंहबुना तुम्हीच स्वत: गुन्हेगार होता.[६] ३२

وَقَالَ الَّذِيْنَ اسْتُضْعِفُوْا لِلَّذِيْنَ اسْتَكْبَرُوْا بَلْ مَكْرُ الَّيْلِ وَالنَّهَارِ اِذْ تَاْمُرُوْنَنَآ اَنْ نَّكْفُرَ بِاللّٰهِ وَنَجْعَلَ لَهٗٓ اَنْدَادًا ۭ وَاَسَرُّوا النَّدَامَةَ لَمَّا رَاَوُا الْعَذَابَ ۭ وَجَعَلْنَا الْاَغْلٰلَ فِيْٓ اَعْنَاقِ الَّذِيْنَ كَفَرُوْا ۭ هَلْ يُجْزَوْنَ اِلَّا مَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿٣٣﴾

(याच्या उत्तरांत) हे कनिष्ठ लोक, या गर्विष्टांना सांगतील, (नाही! नाही!!) किंबहुना तुमचे रात्रंदिवसांच्या डांवपेचांनी, आम्हास अल्लाहबरोबर कुफ्र करणे, आणि त्याचे सरकतदार ठरविण्याचा हुकूम देणे, आमच्या ईमान न आणण्याला कारणीभूत झाले,[७] आणि शिक्षेला पाहतांच सर्वच्या सर्व मनांतल्या मनांत पश्चात्ताप पावत असाल; आणि[८] काफिरांच्या मानेवर आम्ही खोडे टाकून देऊं;[९] त्यांना फक्त त्यांनी केलेल्या आणि करविलेल्या कर्मांचा बदला दिला जाईल.[१०] ३३

१) म्हणजे अल्लाहतआलाने कयामतचा एक दिवस नक्की करून ठेवला आहे. ज्याचे ज्ञान फक्त त्यालाच आहे. तथापि ज्यावेळी तो नक्की वेळ येऊन ठेपेल. तर एक घटका देखील मागे पुढे होणार नाही.

२) जसे तौरात, जबूर आणि इंजील वगैरे. काहींनी 'बयन यदय्हि' ने अभिप्रेत परलोकांतील घर घेतले आहे. याच्यांत काफिरांच्या शिरजोरी आणि अत्याचाराचे वर्णन आहे की, ते सर्व प्रमाणे असून सुद्धां कुरआन करीम आणि परलोकावर ईमान आणण्यापासून पळ काढतात.

३) म्हणजे जगांत हे कुफ्र आणि शिर्कमध्ये, एक दुसऱ्याचे साथी आणि या नात्याने एक दुसऱ्याशी प्रेम करणारे होते. परंतु परलोकांत ते एक दुसऱ्याचे शत्रु, आणि एक दुसऱ्यावर दोषारोपण करणारे होतील.

४) म्हणजे सर्व जगांत हे लोक जे काही चिंतन मनन केल्याशिवाय सर्वसाधारण लोकांच्या प्रमाणे चालणारे असतात; आपल्या त्या पुढाऱ्यांना म्हणतील, ज्यांचे ते जगांत अनुयायी होऊन राहिले होते.

५) म्हणजे तुम्हीच आम्हांस, पैगंबर आणि सत्त्याच्या आवाहकांमागे, चालण्यापासून रोकून ठेवले होते; जर तुम्ही असे न करते, तर आम्ही खचित्च ईमानवाले झाले असतो.

६) म्हणजे आमच्याजवळ कोणती शक्ती होती की, आम्ही तुम्हांस सन्मार्गापासून अडवितो. तुम्ही तर स्वत:च यावर चिंतन मनन केले नाही. आणि आपल्या मर्जीनुसारच याला मान्य करण्यापासून पळ काढला. आणि आज अपराधी आम्हांस बनवीत आहांत ? वास्तविक सर्व काही तुम्ही आपल्या मर्जीने केले; म्हणून अपराधी पण, तुम्ही स्वत:च आहांत, न की आम्ही.

७) म्हणजे आम्ही अपराधी तर तेव्हांहोतो, जेव्हांआम्ही आपल्या मर्जीने पैगंबरांना खोटे ठरवतो जेव्हा की, वास्तविकता ही आहे की, तुम्ही रात्रंदिवस आम्हांला, बहकविण्यावर आणि अल्लाहबरोबर कुफ्र करण्यावर, आणि त्याचा सरकतदार ठरविण्यावर आम्हांस तयार करीत राहिले. ज्यामुळे सरशेवटी आम्ही तुमच्या नादी लागून, ईमानापासून वंचित राहिलोत.

८) म्हणजे एक दुसऱ्यावर दोषारोपण तर करतील, परंतु मनांत दोन्हीही पक्ष, आपआपल्या कुफ्रवर लज्जीत होतील. परंतु, जाहीर करणार नाहीत.

९) म्हणजे अशा साखळ्या ज्या यांच्या हातांना मानेशी बांधतील.

१०) म्हणजे दोघांना यांच्या कर्मांची शिक्षा मिळेल. पुढाऱ्यांना त्यांच्याप्रमाणे, आणि त्यांच्यामागे चालणाऱ्यांना त्यांच्याप्रमाणे; जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''म्हणजे प्रत्येकाला दुप्पट शिक्षा होईल.'' (सू.अअ्राफ-३८)

وَمَآ اَرۡسَلۡنَا فِىۡ قَرۡيَةٍ مِّنۡ نَّذِيۡرٍ اِلَّا قَالَ مُتۡرَفُوۡهَاۤ ۙ اِنَّا بِمَاۤ اُرۡسِلۡتُمۡ بِهٖ كٰفِرُوۡنَ ﴿٣٤﴾

**आणि आम्ही तर ज्या वस्तीत, जो पण सावध करणारा पाठविला, तेथल्या सूसंपन्न लोकांनी हेच सांगितले की ज्या गोष्टीला घेऊन तुम्ही पाठविले गेले आहांत, आम्ही तर त्याला नाकारणारे आहोत.** [१] ३४

وَقَالُوۡا نَحۡنُ اَكۡثَرُ اَمۡوَالًا وَّاَوۡلَادًا ۙ وَّمَا نَحۡنُ بِمُعَذَّبِيۡنَ ﴿٣٥﴾

**आणि सांगितले आम्ही संपत्ती आणि संततीत खुपच वाढलेलो आहोत. हे होऊं शकत नाही की, आम्हांस शिक्षा केली जाईल.** [२] ३५

قُلۡ اِنَّ رَبِّىۡ يَبۡسُطُ الرِّزۡقَ لِمَنۡ يَّشَآءُ وَيَقۡدِرُ وَلٰـكِنَّ اَكۡثَرَ النَّاسِ لَا يَعۡلَمُوۡنَ ﴿٣٦﴾

**(आपण) सांगून द्या की, माझा पालनकर्ता ज्याला इच्छील, त्याला भरपूर अन्न संपत्ती देतो; आणि (ज्याला इच्छील) त्याला काटकसरीने पण देतो;** [३] **परंतु बहुतेक लोक समजत नाहीत** ३६

وَمَاۤ اَمۡوَالُكُمۡ وَلَاۤ اَوۡلَادُكُمۡ بِالَّتِىۡ تُقَرِّبُكُمۡ عِنۡدَنَا زُلۡفٰٓى اِلَّا مَنۡ اٰمَنَ وَعَمِلَ صَالِحًـا ۙ فَاُولٰٓـئِكَ لَهُمۡ جَزَآءُ الضِّعۡفِ بِمَا عَمِلُوۡا وَهُمۡ فِى الۡغُرُفٰتِ اٰمِنُوۡنَ ﴿٣٧﴾

**आणि तुमची संपत्ती आणि संतती अशी नाही की, तुम्हास आमच्या जवळ, सानिध्य प्राप्त करून देईल;** [४] **(परंतु) होय! जे ईमान आणतील आणि चांगली कामे करतील** [५] **त्यांच्या करीतां त्यांच्या कर्मांचा दुप्पट मोबदला आहे.** [६] **आणि ते निर्भय होऊन (स्वर्गाच्या) सज्ज्यांमध्ये बसलेले असतील** ३७

१) हे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे सांत्वन केले जात आहे की, मक्केचे श्रीमंत आणि पुढारी आपल्यावर ईमान आणित नाहीत, आणि आपणास इजा पोहचवित आहेत, तर ही काही नवी गोष्ट नाही. प्रत्येक काळांतील सुख संपन्न लोकांनी पैगंबरांना खोटेच ठरविले आहे. आणि प्रत्येक पैगंबरावर ईमान आणणारे, पहिल्या प्रथम समाजातील गरीब आणि नाद्दार प्रकारचेच लोक असावयाचे. जसे ह.नूह عليه السلام च्या लोकांनी आपल्या पैगंबरांना सांगितले, ''काय आम्ही तुझ्यावर ईमान आणावे, जेव्हांकी तुझे अनुयायी कनिष्ठ दर्जाचे लोक आहेत.'' (सू.शुअराअ-१११) ''आम्ही तर तुला आपल्या सारखाच माणूस पहात आहोत. आणि तुझ्या आज्ञांकीत लोकांस पाहतो, शिवाय नीच ढोबळ समजवाल्यांशिवाय आणखी कोणी नाही.'' (सू.हूद-२७) दुसऱ्या पैगंबरांना पण त्यांच्या लोकांनी हेच सांगितले; पहावे उदाहरणार्थ, सू.अअ्राफ-७५, सू.अन्आम-५३, सू.बनी इस्राईल-१६ वगैरे, 'मुत्रफून' चा अर्थ आहे श्रीमंत आणि सत्ताधीश लोक.

२) म्हणजे जेव्हांआम्हाला या जगांत, अल्लाहने भरपूर संपत्ती आणि संतती बहाल केली आहे, तर जरी कयामत आली तरी आम्हांस शिक्षा होणार नाही. जणूं त्यांनी परलोकाला सुद्धा इहलोकासारखेच समजले. की ज्याप्रमाणे जगात, काफिर आणि मोमिन सर्वांना अल्लाहच्या देणग्या मिळत आहेत; परलोकांत पण असेच होईल, वास्तविक परलोकतर कर्मांचे फळ मिळण्याचे ठिकाण आहे. तेथे तर जगांत केलेल्या कर्मांचा मोबदला मिळणार आहे. चांगल्या कर्मांचा बदला चांगला आणि वाईट कर्मांचा वाईट. जेव्हा की, हे जग परीक्षा घेण्याचे ठिकाण आहे. येथे अल्लाहतआला कसोटी म्हणून, सर्वांना ऐहिक देणग्या बहाल करतो. किंवा त्यांनी ऐहिक साजसरंजामाच्या विपुलतेला, अल्लाहच्या प्रसन्नतेचे द्योतक समजले. वास्तविक असे सुद्धां नाही. जर असे असते तर, अल्लाहतआला आपल्या आज्ञाधारक सेवकांना, सर्वांत जास्त, संपत्ती आणि संतती बहाल करतां.

३) याच्यांत काफिरांच्या चर्चित, चुकीची समजूत आणि शंकेचे निर्सन करण्यांत येत आहे की, अन्नसंपत्तीची विपुलता किंवा काटकसर अल्लाहची प्रसन्नता किंवा अप्रसन्नतेचे द्योतक नाही; किंबहुना याचा संबंध अल्लाहच्या प्रयोजन आणि मर्जीशी आहे. यासाठी तो संपत्ती त्याला पण देतो, ज्याला तो पसंत करतो; आणि त्याला पण, ज्याला नापसंत करतो. आणि ज्याला इच्छितो, श्रीमंत करतो; आणि ज्याला इच्छीतो गरीब ठेवतो.

४) म्हणजे ही धनसंपत्ती या गोष्टीचे प्रमाण नाही की, आम्हांस तुमच्याशी प्रेम आहे. आणि आमच्याजवळ तुम्हांस खास स्थान प्राप्त आहे.

५) म्हणजे आमचे प्रेम आणि जवळीक प्राप्त करण्याचे साधन तर फक्त ईमान आणि सुकृत्ये आहेस, ज्याप्रमाणे हदीसमध्ये फर्माविले, ''अल्लाहतआला तुमचे चेहरे आणि तुमची धनसंपत्ती पाहत नाही, तो तर तुमची अंत:करणे आणि कर्मांना पाहतो.'' (स.मुस्लिम)

६) किंबहुना किती तरी पट, एका पुण्याचा बदला, कमीत कमी दहा पट, आणखी सातशे पट किंबहुना याच्यापेक्षांसुद्धां जास्त.

وَالَّذِيْنَ يَسْعَوْنَ فِيْٓ اٰيٰتِنَا مُعٰجِزِيْنَ اُولٰٓئِكَ فِي الْعَذَابِ مُحْضَرُوْنَ ﴿٣٨﴾

**आणि जे लोक, आमच्या निशाण्यांच्या विरोधासाठी झटतात; हेच आहे जे शिक्षेत हजर केले जातील.** (३८)

قُلْ اِنَّ رَبِّيْ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ وَيَقْدِرُ لَهٗ ؕ وَمَآ اَنْفَقْتُمْ مِّنْ شَيْءٍ فَهُوَ يُخْلِفُهٗ ۚ وَهُوَ خَيْرُ الرّٰزِقِيْنَ ﴿٣٩﴾

**(आपण) सांगून टाका की, माझा पालनकर्ता आपल्या सेवकांमधून ज्याच्यासाठी इच्छील, अन्नसंपत्ती वाढवितो आणि ज्याच्यासाठी इच्छील, त्याला काटकसरीने देतो. [१] तुम्ही जे काही पण अल्लाहच्या मार्गांत खर्च कराल, अल्लाह त्याचा (पुरेपूर) मोबदला देईल. [२] आणि तो सर्वांत उत्कृष्ट अन्नदाता आहे. [३]** (३९)

وَيَوْمَ يَحْشُرُهُمْ جَمِيْعًا ثُمَّ يَقُوْلُ لِلْمَلٰٓئِكَةِ اَهٰٓؤُلَآءِ اِيَّاكُمْ كَانُوْا يَعْبُدُوْنَ ﴿٤٠﴾

**आणि या सर्वांना अल्लाह त्या दिवशी एकत्रित गोळा करून देवदुतांना विचारील की, काय हे लोक तुमची उपासना करीत होते? [४]** (४०)

قَالُوْا سُبْحٰنَكَ اَنْتَ وَلِيُّنَا مِنْ دُوْنِهِمْ ۚ بَلْ كَانُوْا يَعْبُدُوْنَ الْجِنَّ ۚ اَكْثَرُهُمْ بِهِمْ مُّؤْمِنُوْنَ ﴿٤١﴾

**ते म्हणतील, तू पवित्र आहेस; आमचा दोस्त तर तू आहेस, न की, [५] हे. हे लोक जिन्नातांची उपासना करीत होते. [६] यांच्यातून बहुतेक लोकांचे त्यांच्यावरच ईमान होते.** (४१)

१) तो कधी काफिराला पण खूप धनसंपत्ती देतो. परंतु कशासाठी? ढील म्हणून आणि कधी ईमानवाल्याला अडचणीत ठेवतो. कशासाठी? त्याच्या पुण्यप्रतिफळामध्ये वाढ व्हावी, म्हणून. म्हणूनच धनसंपत्तीची विपुलता, त्याच्या प्रसन्नतेची, आणि तिची कमतरता त्याच्या अप्रसन्नतेचे प्रमाण नाही. हे वारंवार सांगणे ताकीद करण्यासाठी आहे.

२) 'इख्लाफ' चा अर्थ आहे, वेतन आणि मोबदला देणे. हा मोबदला जगांत पण शक्य आहे, आणि परलोकांत तर नक्कीच आहे. हदीसे कुदसीमध्ये येते, अल्लाहतआला फर्मावितो, ''तूं खर्च कर, मी तुझ्यावर खर्च करीन.'' (स.बुखारी सू.हूद) (म्हणजे बदला देईन) दोन देवदूत दररोज घोषणा करतात, एक म्हणतो, ''हे अल्लाह ! खर्च न करणाऱ्याच्या धनसंपत्तीला व्यर्थ करून दे ! '' दुसरा म्हणतो ''हे अल्लाह ! खर्च करणाऱ्याला बदला, बहाल कर !'' (स.बुखारी)

३) कारण की,एक सेवक जर कोणाला काही देतो, तर त्याचे हे देणे, अल्लाहतआलाकडून तशी बुद्धी आणि त्याच्या दैवांतच आहे. वास्तवांत देणारा, त्याचा रोजी देणारा नाही. ज्याप्रमाणे मुलांचा पिता किंवा राजा आपल्या सैन्याचा जबाबदार म्हणविला जातो. वास्तविक हुकूम देणारा आणि हुकूम पाळणारा, मुले आणि मोठे सर्वांना रोजी देणारा वास्तवांत अल्लाहतआला आहे. जो सर्वांचा निर्माणकर्ता पण आहे. म्हणून जो मनुष्य अल्लाहच्या दिलेल्या धनसंपत्तीमधून कोणाला काही देतो, तर तो अशा धनसंपत्तीत फेरबदल करतो, जी अल्लाहनेच त्याला दिली आहे. तर वास्तविक रोजी देणारा पण अल्लाहच झाला; तथापि, ही त्याची आणखी दया आणि कृपा आहे की त्याच्या दिलेल्या धनसंपत्तीत त्याच्या मर्जीनुसार खर्च करण्यावर तो पुण्यप्रतिफळ पण देतो.

४) हे मुशरिक लोकांना फजित आणि अपमानित करण्यासाठी अल्लाहतआला देवदुतांना विचारील; जसे ह.ईसा عليه السلام च्या बाबतीत येते की, अल्लाहतआला त्यांना पण विचारील ''काय तूंलोकांस सांगितले होते की, मला आणि माझ्या आईला (मर्यम) अल्लाहच्या शिवाय उपास्य बनवून घ्यावे ?'' (सू.माईद-११६) ह.ईसा عليه السلام सांगतील, ''हे अल्लाह ! तूं पवित्र आहेस. ज्याचा मला काही अधिकार नव्हता, ती गोष्ट मी कां म्हणून सांगू शकलो असतो?'' अशाच प्रकारे अल्लाहतआला देवदुतांना सुद्धा विचारील जसे की, सू.फुर्कान आ.१७ मध्ये सुद्धां येऊन चुकले की काय हे तुमच्या सांगण्यावरून तुमची उपासना करीत होते ?

५) म्हणजे देवदूत सुद्धां ह.ईसा عليه السلام प्रमाणे, अल्लाहतआलाचे पावित्र्य वर्णन करून, आपण निर्दोष असल्याचे जाहीर करतील. आणि म्हणतील, आम्ही तर तुझे सेवक आहोत. आणि तूंआमचा पुरस्कर्ता आहेस. आमचा त्यांच्याशी काय संबंध ?

६) 'जिन्न' ने अभिप्रेत शैतान आहेत. म्हणजे हे, खरे तर शैतानाचे पुजारी आहेत; कारण की तेच त्यांना मुर्त्यांच्या उपासनेवर लावीत; आणि त्यांना बहकवित असत. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''हे तर अल्लाहला सोडून फक्त स्त्रियांना पुजतात, आणि खरोखर हे फक्त, शिरजोर शैतानाला पुजतात'' (सू.निसाअ-११७)

فَالْيَوْمَ لَا يَمْلِكُ بَعْضُكُمْ لِبَعْضٍ نَّفْعًا وَّلَا ضَرًّا ؕ وَنَقُوْلُ لِلَّذِيْنَ ظَلَمُوْا ذُوْقُوْا عَذَابَ النَّارِ الَّتِيْ كُنْتُمْ بِهَا تُكَذِّبُوْنَ ﴿٤٢﴾

तर आज तुमच्यातून कोणी सुद्धा, कोणा करीता सुद्धां, कुठल्याही प्रकारच्या नफा नुकसानाचे मालक राहणार नाही. (१) आणि आम्ही जुलुमी (२) लोकांना सांगून टाकू की, या आगीच्या शिक्षेची गोडी चाखा, जिला तुम्ही खोटे ठरवीत राहीलात. ४२

وَإِذَا تُتْلٰى عَلَيْهِمْ اٰيٰتُنَا بَيِّنٰتٍ قَالُوْا مَا هٰذَآ اِلَّا رَجُلٌ يُّرِيْدُ اَنْ يَّصُدَّكُمْ عَمَّا كَانَ يَعْبُدُ اٰبَآؤُكُمْ ۚ وَقَالُوْا مَا هٰذَآ اِلَّآ اِفْكٌ مُّفْتَرًى ؕ وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لِلْحَقِّ لَمَّا جَآءَهُمْ ۙ اِنْ هٰذَآ اِلَّا سِحْرٌ مُّبِيْنٌ ﴿٤٣﴾

आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमची स्पष्ट स्पष्ट महावाक्ये वांचली जातात, तर म्हणतात की, हा मनुष्य (३) तर तुम्हांस तुमच्या वाडवडीलांच्या उपास्यांपासून अडवून ठेवूं इच्छितो, (याच्याशिवाय दुसरी कोणी गोष्ट नाही.) आणि म्हणतात की, हे तर रचलेले निव्वळ थोतांड आहे. (४) आणि सत्य त्यांच्याजवळ येऊन पोहचले, तरी सुद्धां काफिर हेच म्हणत राहिलेत की, ही तर धडधडीत जादू आहे. (५) ४३

وَمَآ اٰتَيْنٰهُمْ مِّنْ كُتُبٍ يَّدْرُسُوْنَهَا وَمَآ اَرْسَلْنَآ اِلَيْهِمْ قَبْلَكَ مِنْ نَّذِيْرٍ ﴿٤٤﴾

आणि यांना (मक्केवाल्या) ना तर आम्ही, पुस्तके देऊन ठेवली आहेत, ज्यांना ते वांचत असतील, न यांच्याजवळ, आपल्यापूर्वी कोणी, सावध करणारा आला. (६) ४४

وَكَذَّبَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ ۙ وَمَا بَلَغُوْا مِعْشَارَ مَآ اٰتَيْنٰهُمْ فَكَذَّبُوْا رُسُلِيْ ۫ فَكَيْفَ كَانَ نَكِيْرِ ﴿٤٥﴾

आणि यांच्या पूर्वीच्या लोकांनी सुद्धां, आमच्या गोष्टींना खोटे ठरवले होते; आणि आम्ही त्यांना जे देऊन ठेवले होते, त्याच्या दहाव्या हिश्श्यासाठी (हे) पोहचले नाहीत; तर त्यांनी माझ्या पैगंबरांना खोटे ठरवले (मग पहा की) माझी शिक्षा कशी (कडक) होती. (७) ४५

قُلْ اِنَّمَآ اَعِظُكُمْ بِوَاحِدَةٍ ۚ اَنْ تَقُوْمُوْا لِلّٰهِ مَثْنٰى وَفُرَادٰى ثُمَّ تَتَفَكَّرُوْا ۫ مَا بِصَاحِبِكُمْ مِّنْ جِنَّةٍ ؕ اِنْ هُوَ اِلَّا نَذِيْرٌ لَّكُمْ بَيْنَ يَدَيْ عَذَابٍ شَدِيْدٍ ﴿٤٦﴾

सांगून द्या की, मी तुम्हांस फक्त एकाच गोष्टीचा उपदेश करतो की, तुम्ही अल्लाहसाठी (हट्ट सोडून) दोन दोन मिळून किंवा एकटे एकटे उभे राहून विचार तर करा, तुमच्या या साथीदाराला काही वेड तर लागले नाही; (८) तो तर तुम्हांस एक मोठ्या (सक्त) संकटाच्या येण्यापूर्वी सावध करणारा आहे. (९) ४६

قُلْ مَا سَاَلْتُكُمْ مِّنْ اَجْرٍ فَهُوَ لَكُمْ ؕ اِنْ اَجْرِيَ اِلَّا عَلَى اللّٰهِ ۚ وَهُوَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ شَهِيْدٌ ﴿٤٧﴾

सांगून द्या की, जे याच्या मोबदल्यात तुमच्या जवळ मागेन, ते तुम्हांसच दिले; (१०) माझा मोबदला तर अल्लाहतआलाकडेच आहे. तो प्रत्येक गोष्टीवर सर्व साक्षी आहे. ४७

قُلْ اِنَّ رَبِّيْ يَقْذِفُ بِالْحَقِّ ۚ عَلَّامُ الْغُيُوْبِ ﴿٤٨﴾

सांगून द्या की, माझा पालनकर्ता सत्यासह (खरे वह्य) अवतरीत करतो, तो (११) प्रत्येक अदृष्टाचा जाणणारा आहे. ४८

قُلْ جَآءَ الْحَقُّ وَمَا يُبْدِئُ الْبَاطِلُ وَمَا يُعِيْدُ ﴿٤٩﴾

सांगून द्या की, सत्य तर येऊन चुकले, असत्य न पहिल्यावेळेस वर आले, न दुसऱ्यांदा वर येऊ शकेले (१२) ४९

१) म्हणजे जगांत तुम्ही हे समजून त्यांची उपासना करीत होते की, हे तुम्हाला फायदा पोहचवतील, तुमची शिफारस करतील, आणि अल्लाहच्या शिक्षेकडून तुम्हांस मुक्ती देववितील. जसे आजसुद्धां पिरांचे पुजारी, आणि कबरपूजक, यांची स्थिती आहे. परंतु आज पाहून घ्या की, हे लोक कुठल्याही गोष्टीवर समर्थ नाहीत.

२) 'जुल्मी' नी अभिप्रेत अल्लाहशिवाय इतरांचे पुजारी आहेत. कारण की शिर्क, सर्वांत मोठा जुलूम आहे. आणि मुशरिक सर्वांत मोठे जुलुमी.

३) मनुष्याने अभिप्रेत, ह.नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत. वाडवडीलांचा धर्म, त्यांच्याजवळ बरोबर होता. म्हणून त्यांनी आपला (सल्ल.) 'अपराध' हा सांगितला की, हा तुम्हांस त्या उपास्यांपासून अडवूं इच्छितो, ज्यांची, तुमचे वाडवडील उपासना करीत राहिले.

४) दुसऱ्या 'हाजा' ने अभिप्रेत कुरआन करीम आहे. त्याला त्यांनी रचलेले कुभांड, किंवा घडविलेले खोटे ठरविले.

५) कुरआनाला पहिले घडविलेले खोटे म्हटले. आणि येथे धडधडीत जादू. पहिल्याचा संबंध कुरआनाचा भावार्थ आणि अर्थाशी आहे. आणि दुसऱ्याचा संबंध, कुरआनाच्या चमत्कारपूर्ण काव्य आणि चाल व वर्णन शैलीशी. (फत्हुल कदीर)

६) म्हणून ते आकांक्षा करीत होते की, त्यांच्याजवळ पण कोण्या पैगंबराने यावे. आणि कोणी आकाशी ग्रंथ अवतरीत व्हावा. परंतु जेव्हां या गोष्टी आल्यांत, तर त्यांना नाकारून टाकले.

७) ही मक्केच्या काफिरांना तंबी देण्यांत येत आहे की, तुम्ही खोटे ठरवण्याचा आणि नाकारण्याचा जो मार्ग अनुसरला आहे, तो फारच धोकादायक आहे. तुमच्या पूर्वीच्या उम्मतीसुद्धां, या मार्गावर चालून नष्ट झाल्या आहेत. वास्तविक या उम्मती धनदौलत, शक्ती आणि सामर्थ्य आणि वयांच्या मानाने, तुमच्या पेक्षांवरचढ होत्या. तुम्ही त्यांच्या दहाव्या हिश्श्याला पण पोहचत नाहीत. परंतु असे असून सुद्धा ते अल्लाहच्या शिक्षेपासून वांचू शकल्या नाहीत. याच विषयाला सू.अहकाफ आ.२६ मध्ये सांगण्यात आले आहे.

८) म्हणजे मी तुम्हांस तुमच्या सद्य स्थितीत असलेल्या, कर्म करण्याच्या पद्धतीने भिवविती, आणि एकाच गोष्टीचा उपदेश करतो. तो हा की, हट्ट आणि अहंकार सोडून फक्त अल्लाहकरीतां एक एक दोन दोन होऊन माझ्या गोष्टीवर विचार करा की माझे जीवन तुमच्यांत गेले आहे. आणि आतांसुद्धां तुम्हांस जे आवाहन मी करीत आहे; काय याच्यांत काय अशी गोष्ट आहे की, ज्याच्यामुळे असे वाटते की, माझ्यांत वेडेपणा आहे? तुम्ही जर पक्षपात आणि मनेच्छेला सोडून, विचार कराल, तर खचित्‌च तुम्ही समजून जाल, की तुमच्या मित्रांत काही वेडेपणा नाही.

९) म्हणजे तो तर फक्त तुमच्या मार्गदर्शनासाठी आलेला आहे की तुम्ही या तिव्र शिक्षेकडून वांचून जावे. जी, सरळमार्ग न अंगीकारल्यामुळे तुम्हांस भोगावी लागेल. हदीसमध्ये येते की, नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम एका दिवशी, सफा डोंगरावर चढून गेले आणि म्हटले 'या सबाहाह!' ज्याला ऐकून कुरैश गोळा होऊन गेलेत. आपण ﷺ म्हणाले, सांगा! जर मी तुम्हांस बातमी देईन, की शत्रू सकाळी किंवा संध्याकाळी तुमच्यावर हल्ला करणार आहे. तर काय तुम्ही माझे हे म्हणणे मान्य कराल? त्यांनी म्हटले '' का नाही?'' आपण ﷺ नी सांगितले की, ''तर मग ऐकून घ्या, मी तुम्हास कडक शिक्षा येण्याच्या पूर्वी भिववित आहे.'' हे ऐकून अबुलहब म्हणाला, ''तुझ्या करतां बर्बादी असो! काय याचसाठी तू आम्हास गोळा केले होतेस?'' ज्यावर अल्लाहतआलाने सू.'तब्बत यदा अबी लहब' अवतरीत केले. (स.बुखारी, तफसीर सू.सबा.)

१०) यात आपली निरपेक्षता व ऐहिक धन व मालमत्तेकडून निरीच्छा जाहीर करून टाकली. कारण की यांच्या मनांत जर ही शंका निर्माण झाली की, या पैगंबरीच्या दाव्याने याचा उद्देश्य कोठे ऐहिक फायदे उचलणे तर नाही ? तर ती शंका दूर होऊन जावी.

११) 'कजफ' चा अर्थ तिरंदाजी आणि धोंडमार करणे आहे; आणि दुसरा अर्थ संभाषण करण्याचे पण आहे. येथे त्याचा हाच दुसरा च अर्थ आहे. म्हणजे जो सत्त्यासह संभाषण करतो, आपल्या पैगंबरांवर 'वह्य' अवतरीत करतो. आणि यांच्या मार्फत लोकांना सत्य जाहीर करतो. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आपल्या सेवकांमधून ज्याला इच्छितो, देवदुतांमार्फत आपले वह्य बहाल करतो.'' (सू.मोमिन-१५)

१२) 'हक' ने अभिप्रेत कुरआन आणि 'बातील' ने अभिप्रेत कुफ्र आणि शिर्क आहे. अर्थ आहे अल्लाहकडून, अल्लाहचा ध र्म, आणि त्याचे कुरआन येऊन लागले आहे. ज्याने असत्य दुर्बल आणि संपून गेलेले आहे. आतां ते डोके वर करण्याच्या लायकीचे राहिले नाही. ज्याप्रमाणे सांगितले की, ''किंबहुना आम्ही सत्त्याला, असत्त्यावर फेकून मारतो, मग सत्य असत्याचे मस्तक फोडून टाकते; आणि ते त्याचवेळी नाहिसे होऊन जाते.'' (सू.अंबिया - १८) हदीसमध्ये येते की, ज्या दिवशी मक्का जिंकले गेले, नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, खाना-ए-काबामध्ये दाखल झाले. सर्वदूर मूर्त्या स्थानापन्न होत्या. आपण ﷺ धनुष्याचे टोकाने त्यांना मारत जात, आणि हे महावाक्य आणि सू.बनी इस्राईलचे महावाक्य, ''वकुल्‌ जाअल्‌ हक्कु व जहकल्‌ बातील'' म्हणत जात होते. (स.बुखारी)

قُلْ إِن ضَلَلْتُ فَإِنَّمَآ أَضِلُّ عَلَىٰ نَفْسِى ۖ وَإِنِ ٱهْتَدَيْتُ فَبِمَا يُوحِىٓ إِلَىَّ رَبِّىٓ ۚ إِنَّهُۥ سَمِيعٌ قَرِيبٌ ﴿٥٠﴾

**सांगून द्या की, जर मी बहकून गेलो, तर माझ्या बहकण्याची शिक्षा माझ्यावरच आहे. आणि जर मी सरळ मार्गावर आहे, तर या वह्याच्या सबबीने, जे माझ्या पालनकर्त्याने माझ्यावर केले आहे,** [१] **तो फारच ऐकणारा आणि फारच जवळ आहे.** [२] (५०)

وَلَوْ تَرَىٰٓ إِذْ فَزِعُوا۟ فَلَا فَوْتَ وَأُخِذُوا۟ مِن مَّكَانٍ قَرِيبٍ ﴿٥١﴾

**आणि जर आपण तो समय पाहाल, जेव्हांकी काफिर घाबरे घाबरे फिरत असतील, मग तेथून पळून जाणे शक्य होणार नाही;** [३] **आणि जवळूनच धरून घेतले जातील.** (५१)

وَقَالُوٓا۟ ءَامَنَّا بِهِۦ وَأَنَّىٰ لَهُمُ ٱلتَّنَاوُشُ مِن مَّكَانٍۭ بَعِيدٍ ﴿٥٢﴾

**आणि त्यावेळी म्हणतील की, आम्ही या कुरआनावर ईमान आणले, परंतु इतक्या लांबच्या पल्ल्याहून ते त्यांच्या हातापर्यंत कसे पोहचूं शकते.** [४] (५२)

وَقَدْ كَفَرُوا۟ بِهِۦ مِن قَبْلُ ۖ وَيَقْذِفُونَ بِٱلْغَيْبِ مِن مَّكَانٍۭ بَعِيدٍ ﴿٥٣﴾

**आणि याच्यापूर्वी तर त्यांनी याला नाकारले होते, आणि लांबूनच पाहिल्याशिवाय, (अटकळीचे बाण) फेंकत होते.** [५] (५३)

وَحِيلَ بَيْنَهُمْ وَبَيْنَ مَا يَشْتَهُونَ كَمَا فُعِلَ بِأَشْيَاعِهِم مِّن قَبْلُ ۚ إِنَّهُمْ كَانُوا۟ فِى شَكٍّ مُّرِيبٍۭ ﴿٥٤﴾

**आणि यांच्या आकांक्षा आणि यांच्या दर्म्यान एक अडकण घालून देण्यात आले;** [६] **जसे की, याच्यापूर्वी सुद्धां, यांच्यासारख्या बरोबर केले गेले,** [७] **ते संशयांत आणि गोंधळात पडले होते.** [८] (५४)

१) म्हणजे सर्व भलाई अल्लाहकडून आहे. आणि अल्लाहतआलाने जे वह्य आणि खुले सत्य अवतरीत केले आहे. याच्यात सत्य आणि सन्मार्ग दर्शन आहे. लोकांना सरळ मार्ग याच्याचकडून मिळतो. मग जो बहकतो, याच्यांत माणसाची आपली स्वत:ची कोताई आहे, आणि त्यात मनोकामनेचा भाग असतो. म्हणून याचे ओझे पण त्याच्यावरच राहील. ह.अब्दुल्लाह बिन मसऊद ﵁ जेव्हा कधी कोण्या विचारणाऱ्याच्या उत्तरांत, आपल्याकडून काही सांगत, तर त्याच्या बरोबर म्हणत, ''मी जे काही सांगत आहे हे माझे विचार आहेत, जर हे सत्य आहे, तर अल्लाहकडून आहे आणि जर चूक आहे तर माझ्याकडून आणि शैतानाकडून आहे. अल्लाह आणि त्यांचे पैगंबर या गोष्टीपासून मुक्त आहे'' (इब्ने कसीर)

२) ज्याप्रमाणे हदीसमध्ये सांगितले, ''तुम्ही बहिऱ्या आणि अदृष्य व्यक्तित्वाला बोलावित नाही; किंबहुना त्याला बोलावितात जो, ऐकणारा, जवळ, आणि मान्य करणारा आहे.'' (स.बुखारी)

३) कोठे पळू शकणार नाही कारण की ते अल्लाहच्या पकडीत असतील हे हशरच्या मैदानाचे वर्णन आहे.

४) 'तनावुश' चा अर्थ 'तनावुल' चा आहे. म्हणजे धरण्याचा आहे. म्हणजे आतां परलोकांत त्यांना ईमान कशाप्रकारे प्राप्त होऊं शकते, जेव्हांकी जगांत यापासून पळ काढीत राहिले. जणूं परलोक ईमानासाठी जगाच्या तुलनेत दूरची जागा आहे. ज्याप्रमाणे दुरून कोण्या वस्तुला धरणे शक्य नाही, परलोकांत ईमान आणण्याला वाव नाही.

५) म्हणजे आपल्या कल्पनेने म्हणत राहिले की, कयामत आणि हिशोब वगैरे नाही. किंवा कुरआनाच्या बाबतीत म्हणत राहिले की, हे जादू, रचलेले खोटे आणि पूर्वींच्या लोकांच्या गोष्टी आहेत. किंवा मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत म्हणत राहिलेत, हा जादूगर आहे, मांत्रिक आहे, कवी आहे, किंवा वेडा आहे. जेव्हांकी कोण्या गोष्टीचे कोणतेही प्रमाण त्यांच्याजवळ नव्हते.

६) म्हणजे परलोकांत ते इच्छतील की, त्यांचे ईमान कबूल करून घेतले जावे. शिक्षेपासून त्यांची सुटका होऊन जावी. परंतु त्यांच्या आणि त्यांच्या या आकांक्षेदर्म्यान अडकण करून दिले जाईल. म्हणजे या इच्छेला रद्द करून टाकण्यांत येईल.

७) म्हणजे मागच्या उम्मतीचे ईमान पण, त्यावेळी मान्य करण्यांत आले नाही. जेव्हांत्यांनी शिक्षा पाहून ईमान आणले.

८) म्हणून आतां शिक्षां पाहून, त्यानंतर, त्यांचे ईमान सुद्धां कशा प्रकारे मान्य होऊं शकते ? ह.कतादा ﵁ म्हणतात ''शंके कुशंकेपासून वाचा;'' जो शंकेच्या स्थितीत मेला, याच स्थितीत उठेल. आणि जो विश्वासावर मरेल, कयामतच्या दिवशी विश्वासावरच उठेल.'' (इब्ने कसीर)

أياتها ٤٥ (٣٥) سُورَةُ فَاطِرٍ مَكِّيَّةٌ (٤٣) ركوعاتها ٥

بِسْمِ اللهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

महावाक्ये ४९ | रुकूअ ५

## (३५) सू. फातिर

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

اَلْحَمْدُ لِلّٰهِ فَاطِرِ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ جَاعِلِ الْمَلٰٓئِكَةِ رُسُلًا اُولِيْٓ اَجْنِحَةٍ مَّثْنٰى وَثُلٰثَ وَرُبٰعَ ؕ يَزِيْدُ فِى الْخَلْقِ مَا يَشَآءُ ؕ اِنَّ اللّٰهَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿١﴾

**सर्व स्तुती त्या खऱ्या उपास्यास (अल्लाहतआलास) योग्य आहे, जो (सुरवातीपासूनच) आकाश आणि पृथ्वीचा निर्माता, [१] आणि दोन दोन तीन तीन चार चार पंखावाल्या देवदुतांना आपले हरकारे बनविणारा आहे. [२] सृष्टीमध्ये जे इच्छितो (ते) जास्त करतो. [३] अल्लाहतआला खचित्च सर्व सामर्थ्यवान आहे. (१)**

مَا يَفْتَحِ اللّٰهُ لِلنَّاسِ مِنْ رَّحْمَةٍ فَلَا مُمْسِكَ لَهَا ۚ وَمَا يُمْسِكْ ۙ فَلَا مُرْسِلَ لَهٗ مِنْ ۢ بَعْدِهٖ ؕ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٢﴾

**अल्लाहतआला जी रहमत लोकांसाठी उघडून देईल, तर तिला कोणी बंद करणारा नाही. आणि जिला बंद करून टाकेल, तर याच्यानंतर तिला कोणी चालूं करणारा नाही [४] आणि तोच परमसमर्थ आणि बुद्धीमान आहे. (२)**

يٰٓاَيُّهَا النَّاسُ اذْكُرُوْا نِعْمَتَ اللّٰهِ عَلَيْكُمْ ؕ هَلْ مِنْ خَالِقٍ غَيْرُ اللّٰهِ يَرْزُقُكُمْ مِّنَ السَّمَآءِ وَالْاَرْضِ ؕ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۖ فَاَنّٰى تُؤْفَكُوْنَ ﴿٣﴾

**लोकांनो ! अल्लाहतआलाने तुमच्यावर जे उपकार केले आहेत, त्यांची आठवण करा. काय अल्लाहशिवाय आणखी कोणी निर्माणकर्ता आहे, जो तुम्हांस आकाश आणि पृथ्वीतून अन्नसंपत्ती पुरवील ? त्याच्या वांचून अन्य कोणी उपास्य नाही; मग तुम्ही कोठे उलटे चालले जात आहांत? [५] (३)**

وَاِنْ يُّكَذِّبُوْكَ فَقَدْ كُذِّبَتْ رُسُلٌ مِّنْ قَبْلِكَ ؕ وَاِلَى اللّٰهِ تُرْجَعُ الْاُمُوْرُ ﴿٤﴾

**आणि जर हे आपणांस खोटे ठरवतील तर, आपल्या पूर्वीच्या तमाम पैगंबरांना सुद्धां खोटे ठरवले जाऊन चुकले आहे; सर्व कामे अल्लाहच्याचकडे रुजुअ केले जातात. [६] (४)**

१) 'फातिरचा' अर्थ आहे. 'मुख्तरिऊन',पहिल्या प्रथम निर्माण करणारा. हा इशारा आहे, अल्लाहच्या सामर्थ्याकडे की त्याने पहिल्या प्रथम आकाश आणि पृथ्वी, नमुन्याशिवाय बनविले. तर त्याच्यासाठी दुसऱ्यांदा, माणसांना निर्माण करणे, कोणते कठीण आहे ?

२) अभिप्रेत जिब्रईल, मिकाईल, इसराफील आणि इज्राईल देवदूत आहेत. ज्यांना अल्लाहतआला पैगंबराकडे किंवा वेगवेगळ्या मोहिमांवर हरकारे बनवून पाठवितो. यांच्यातून कोणाला दोन कोणाला तीन आणि कोणाचे चार पंख आहेत. ज्यांच्या मार्फत ते पृथ्वीवर येतात, आणि पृथ्वीवरून आकाशांत जातात.

३) म्हणजे काही देवदूतांचे याच्यापेक्षांसुद्धा जास्त पंख आहेत. जसे हदीसमध्ये येते, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, मी मेअराजच्या रात्री, जिब्रईलला खऱ्या स्वरूपांत पाहिले; त्याचे सहाशे पंख होते. (स.बुखारी) काहींनी याला सर्वसाधारण ठेवले आहे; ज्याच्यांत, डोळा, चेहरा, नाक आणि तोंड प्रत्येक गोष्टीचे सौंदर्य दाखल आहे.

४) याच देणग्यांमधून पैगंबराना पाठविणे, आणि पुस्तके अवतीर्ण करणेपण आहे. म्हणजे प्रत्येक गोष्टीचा देणारा पण तोच आहे. आणि परत घेणारा, आणि अडविणारा सुद्धां तोच आहे. याच्याशिवाय न कोणी न प्रदान करणारा न इनाम देणारा आहे; आणि न मना करणारा आणि कब्जा करणारा. ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम फर्मावित असत, ''अल्लाहुम्मा ला माने आ, लिमा अअ्तय्ता वला मुअ्तिया लिमा मन्अत'' हे अल्लाह जे तू प्रदान करेल त्याला रोकणारा आणि जे तू रोकून घेशील त्याला देणारा कोणी नाही.

५) म्हणजे या वर्णन आणि खुलाशानंतर, सुद्धां तुम्ही अल्लाहशिवाय इतरांची उपासना करीत आहांत ? 'तुअ्फकून' जर 'अफ्क' पासून असेल, तर अर्थ होईल फिरणे, तुम्ही कोठे फिरवले जातात ? आणि जर 'इफ्क' पासून असेल, तर अर्थ आहे खोटे, सत्त्यापासून फिरण्याचे नांव आहे. अर्थ आहे की, तुमच्यांत एकेश्वरवाद आणि परलोकाचा इन्कार कोठून आला, जेव्हांकी तुम्ही हे मान्य करतात की, तुमचा निर्माणकर्ता, आणि अन्नदाता अल्लाह आहे. (फत्हुल कदीर)

६) याच्यांत नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची सांत्वना करणे आहे की, आपणांस खोटे ठरवून हे कोठे जातील ? सरतेशेवटी सर्व मामल्यांचा निर्णय तर आम्हांसच करावयाचा आहे. ज्याप्रमाणे मागच्या उम्मतींनी, आपल्या पैगंबरांना खोटे ठरवले, तर त्यांना बर्बादी शिवाय काय मिळाले? म्हणून यांनी पण जरी यापासून माघार घेतली नही, तर त्यांना पण नष्ट करणे, आमच्याकरीतां कठीण नाही.

يَا أَيُّهَا النَّاسُ إِنَّ وَعْدَ اللَّهِ حَقٌّ فَلَا تَغُرَّنَّكُمُ الْحَيَاةُ الدُّنْيَا وَلَا يَغُرَّنَّكُم بِاللَّهِ الْغَرُورُ ٥

**लोकांनो ! अल्लाहतआलाचे वचन सत्य आहे; [१] तुम्हांस ऐहिक जीवनाने धोक्यांत टाकू नये; [२] आणि न धोकेबाज शैतानाने तुम्हांस गफलतीत टाकावे [३] ५**

إِنَّ الشَّيْطَانَ لَكُمْ عَدُوٌّ فَاتَّخِذُوهُ عَدُوًّا إِنَّمَا يَدْعُو حِزْبَهُ لِيَكُونُوا مِنْ أَصْحَابِ السَّعِيرِ ٦

**नि:संशय शैतान तुमचा शत्रू आहे, तुम्ही त्याला शत्रू समजा; [४] तो तर आपल्या समूहाला फक्त यासाठी बोलावितो की, त्या सर्वांनी नर्कवासियांमधून होऊन जावे. ६**

الَّذِينَ كَفَرُوا لَهُمْ عَذَابٌ شَدِيدٌ وَالَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ لَهُم مَّغْفِرَةٌ وَأَجْرٌ كَبِيرٌ ٧

**जे लोक काफिर झालेत, त्यांच्यासाठी कडक शिक्षांआहे. आणि ज्या लोकांनी ईमान आणले, आणि चांगली कामे केलीत, त्यांच्याकरतांक्षमा आणि मोठा मोबदला आहे. [५] ७**

أَفَمَن زُيِّنَ لَهُ سُوءُ عَمَلِهِ فَرَآهُ حَسَنًا فَإِنَّ اللَّهَ يُضِلُّ مَن يَشَاءُ وَيَهْدِي مَن يَشَاءُ فَلَا تَذْهَبْ نَفْسُكَ عَلَيْهِمْ حَسَرَاتٍ إِنَّ اللَّهَ عَلِيمٌ بِمَا يَصْنَعُونَ ٨

**काय तो मनुष्य ज्याच्या करीतां त्याची वाईट कर्मे सुशोभित करून दिली गेलीत, मग तो त्यांना चांगला समजतो, [६] विश्वास ठेवा की, अल्लाह ज्याला इच्छितो त्याला बहकवून टाकतो; आणि ज्याला इच्छितो त्याला सरळ मार्ग दाखवितो. [७] तर आपणाला यांचा खेद करून करून आपला जीव नष्ट होण्यांत न टाकला पाहिजे; [८] हे जे काही करीत आहेत, त्याच्याशी खचित्‌च अल्लाहतआला फार चांगल्याप्रकारे वाकबगार आहे. [९] ८**

१) की कयामत घडून येईल, आणि पुण्यवान आणि पापी लोकांना, त्यांच्या कर्मांचे बक्षीस आणि शिक्षा दिली जाईल.

२) म्हणजे परलोकातील त्या देणग्यांकडून गाफील न करून टाकावे, ज्या, अल्लाहतआलाने आपले मित्र आणि पैगंबरांच्या अनुयांयाकरीतां, तयार करून ठेवल्या आहेत. तर या जगाच्या क्षणभंगुर मौजमजेत दंग होऊन, परलोकाच्या चिरकालीन आरामाला दृष्टीआड करू नका.

३) म्हणजे त्याच्या डांवपेचाकडून वांचत रहा; कारण की तो फार धोकेबाज आहे. आणि त्याचा उद्देश्यच तुम्हाला फसवणूकीत व्यस्त करून, आणि ठेवून स्वर्गापासून वंचित ठेवावे. हेच शब्द सू.लूकमान-३३ मध्ये सुद्धा येऊन चुकले आहेत.

४) म्हणजे त्याच्याशी फार शत्रुत्व ठेवा. त्याची फसवणूक धोकेबाजी आणि हाताच्या चलाखीपासून वांचा; ज्याप्रमाणे शत्रुपासून वांचण्यासाठी मनुष्य प्रयत्न करतो. दुसऱ्या ठिकाणी या विषयाला अशाप्रकारे सांगण्यात आले, ''काय तुम्ही शैतान आणि त्याच्या संततीला, मला सोडून, आपला मित्र बनवित आहात? वास्तविक ते तुमचे शत्रू आहेत. जुलूम करणाऱ्यांसाठी वाईट बदला आहे.'' (सू.कहफ-५०)

५) येथे पण अल्लाहतआलाने, दुसऱ्या ठिकाणांसारखे ईमानाबरोबर सुकृत्यांना सांगून, याच्या महत्त्वाला स्पष्ट करून दिले. यासाठी की ईमानवाल्यांनी, सुकृत्यापासून कधीही आळस करू नये. कारण की क्षमा आणि मोठ्या मोबदल्याचे अभिवचन त्या ईमानाबरोबर आहे, ज्याच्याबरोबर सुकृत्ये असतील.

६) ज्याप्रमाणे काफिर आणि आज्ञाभंजक आहेत, ते कुफ्र व शिर्क आणि आज्ञाभंजन व व्यर्थ गोष्टी करतात; आणि असे समजतात की, ते फार चांगले करीत आहेत. तर काय असा मनुष्य ज्याला अल्लाहने मार्गभ्रष्ट करून टाकले असेल, त्याला वांचविण्यासाठी, आपल्याजवळ काही सबब आहे ? उत्तर नकारार्थी आहे. नाही ! खचित्‌च नाही !!

७) अल्लाहतआला आपल्या न्यायाच्या अनुषंगाने, आपल्या पद्धतीप्रमाणे त्याला मार्गभ्रष्ट करतो. जो सतत आपल्या कर्तृत्वाने आपल्याला याचा पात्र ठरवून चुकतो. आणि सन्मार्ग त्याला दाखवितो, आपल्या दये आणि कृपेने, जो याचा इच्छुक असेल.

८) कारण की अल्लाहतआलाचे प्रत्येक काम शहाणपणावर आणि संपूर्ण ज्ञानावर आधारीत असते. म्हणून कोणाच्या मार्गभ्रष्ट होण्यावर इतका खेद करू नये की, आपल्या जिवाला धोक्यात टाकून द्यावे.

९) म्हणजे त्याच्यापासून यांचे काही म्हणणे आणि करणे गुप्त नाही. अर्थ हा आहे की, अल्लाहचा यांच्याबरोबर मामला, एक ज्ञानी आणि जाणकार, आणि एका बुद्धीमानासारखा आहे. सर्व साधारण राजांसारखा नाही, जे आपल्या अधिकारांचा पाहिजे तसा अंधाधुंद उपयोग करतात. कधी सलाम केल्यावर पण नाराज होऊन जातात, आणि कधी शिवी गाळीवर पोषाख बहाल करून टाकतात.

وَاللّٰهُ الَّذِيْٓ اَرْسَلَ الرِّيٰحَ فَتُثِيْرُ سَحَابًا فَسُقْنٰهُ اِلٰى بَلَدٍ مَّيِّتٍ فَاَحْيَيْنَا بِهِ الْاَرْضَ بَعْدَ مَوْتِهَا ۭ كَذٰلِكَ النُّشُوْرُ ۝

आणि अल्लाहच वारे चालवतो, जे ढगांना उभारतात, मग आम्ही ढगांना, कोरड्या जमिनीकडे घेऊन जातो; आणि त्याच्याने त्या जमिनीला, तिच्या मृत झाल्या पश्चात, जिवंत करून देतो. अशाच प्रकारे दुसऱ्यांदा जिवंत होऊन उठणे पण आहे.[१] (९)

مَنْ كَانَ يُرِيْدُ الْعِزَّةَ فَلِلّٰهِ الْعِزَّةُ جَمِيْعًا ۭ اِلَيْهِ يَصْعَدُ الْكَلِمُ الطَّيِّبُ وَالْعَمَلُ الصَّالِحُ يَرْفَعُهٗ ۭ وَالَّذِيْنَ يَمْكُرُوْنَ السَّـيِّاٰتِ لَهُمْ عَذَابٌ شَدِيْدٌ ۭ وَمَكْرُ اُولٰۗىِٕكَ هُوَ يَبُوْرُ ۝

जो मनुष्य इज्ञत आबरू, प्राप्त करूं इच्छित असेल, तर अल्लाहतआला कडूनच, सारी इज्ञत आबरूंआहे.[२] सर्व चांगले शब्द त्याच्याचकडे चढतात.[३] आणि सुकृत्येही त्यांचे दर्जे वाढवितो;[४] जे लोक वाईटाच्या डांवपेचांत लागलेले राहतात,[५] त्यांच्यासाठी फार कडक शिक्षा आहे. आणि त्यांचे हे डांवपेच निष्फळ होऊन जातील.[६] (१०)

وَاللّٰهُ خَلَقَكُمْ مِّنْ تُرَابٍ ثُمَّ مِنْ نُّطْفَةٍ ثُمَّ جَعَلَكُمْ اَزْوَاجًا ۭ وَمَا تَحْمِلُ مِنْ اُنْثٰى وَلَا تَضَعُ اِلَّا بِعِلْمِهٖ ۭ وَمَا يُعَمَّرُ مِنْ مُّعَمَّرٍ وَّلَا يُنْقَصُ مِنْ عُمُرِهٖٓ اِلَّا فِيْ كِتٰبٍ ۭ اِنَّ ذٰلِكَ عَلَي اللّٰهِ يَسِيْرٌ ۝

आणि लोकांनो! अल्लाहतआलाने तुम्हास मातीपासून, मग विर्यबिंदुपासून निर्माण केले आहे.[७] मग तुम्हास जोडी जोडीने (पुरुष) स्त्री बनवून दिले. स्त्रियांचे गर्भधारण करणे आणि मुलांचे जन्माला येणे सर्व त्याच्याच ज्ञानाने आहे.[८] आणि ज्यादी दिर्घआयुष्यवाल्याला आयुष्य दिले जाते, आणि ज्याचे आयुष्य घटविले जाते ते सर्व (लौहे महफुज) पुस्तकांत लिहलेले आहे.[९] अल्लाहतआलासाठी ही गोष्ट फारच सोपी आहे. (११)

وَمَا يَسْتَوِي الْبَحْرٰنِ ڰ هٰذَا عَذْبٌ فُرَاتٌ سَاۗىِٕغٌ شَرَابُهٗ وَهٰذَا مِلْحٌ اُجَاجٌ ۭ وَمِنْ كُلٍّ تَاْكُلُوْنَ لَحْمًا طَرِيًّا وَّتَسْتَخْرِجُوْنَ حِلْيَةً تَلْبَسُوْنَهَا ۚ وَتَرَى الْفُلْكَ فِيْهِ مَوَاخِرَ لِتَبْتَغُوْا مِنْ فَضْلِهٖ وَلَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ۝

आणि दोन समुद्र एक सारखे नसतात; हा गोड आहे, तहान भागवतो, पिण्यात रुचकर आणि हा दुसरा, खारा आहे, कडू; तुम्ही त्या दोघांमधून ताजे ताजे मांस (काढून) खात असतात. आणि जडजवाहीर काढतात, ज्यांना तुम्ही परिधान करीत असतात. आणि आपण पाहतात की, मोठमोठी गलबते, पाण्याला फाडणारी[१०] त्या समुद्रांत आहेत. कारण की, तुम्ही त्याचे औदार्य शोधावे, कारण की तुम्ही त्याचे आभार मानावे (१२)

يُوْلِجُ الَّيْلَ فِي النَّهَارِ وَيُوْلِجُ النَّهَارَ فِي الَّيْلِ ۙ وَسَخَّرَ الشَّمْسَ وَالْقَمَرَ ڮ كُلٌّ يَّجْرِيْ لِاَجَلٍ مُّسَمًّى ۭ ذٰلِكُمُ اللّٰهُ رَبُّكُمْ لَهُ الْمُلْكُ ۭ وَالَّذِيْنَ تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِهٖ مَا يَمْلِكُوْنَ مِنْ قِطْمِيْرٍ ۝

तो रात्रीला दिवसांत, आणि दिवसाला रात्रीत, दाखल करतो; आणि सूर्य आणि चंद्राला यानेच कामाला लावले आहे. प्रत्येक नियमित काळांत मार्ग आक्रमित आहेत. हाच आहे अल्लाह,[११] तुम्हां सर्वांचा पालनकर्ता, त्याचेच राज्य आहे, ज्यांना तुम्ही, त्याच्या शिवाय बोलावित आहांत, ते तर खजुरीच्या बी वरील फोतऱ्याचेपण मालक नाहीत[१२] (१३)

१) म्हणजे ज्याप्रमाणे ढगांतून पाऊस पाडून कोरड्या (मृत) जमिनीला, आम्ही सुपिक (जिवंत) करून देतो. अशाच प्रकारे कयामतच्या दिवशी, तमाम मृत माणसांना पण आम्ही जिवंत करून टाकू. हदीसमध्ये येते की, ''मनुष्याचे सर्व शरीर छिन्न विछिन्न होऊन जात; फक्त कमरेच्या मधल्या हाडाचा एक लहानसा भाग सुरक्षित रहातो. याच्याचपासून त्याची दुसऱ्यांदा निर्मिती व रचना होईल.'' (स.अल्‌बुखारी,स.मुस्लिम)

२) म्हणजे जो इच्छितो की त्याला इहलोकांत आणि परलोकात इज्जत मिळावी, तर त्याने अल्लाहचे आज्ञापालन करावे. त्यामुळे त्याला हा उद्देश्य प्राप्त होऊन जाईल. कारण की, इहलोक आणि परलोकाचा स्वामी अल्लाहच आहे. सर्व इज्जत आबरू त्याच्याच जवळ आहे. ज्याला तो इज्जत देईल, तोच प्रिय होईल. ज्याला तो अपमानित करेल, त्याला जगांतील कुठलीही शक्ती इज्जत देऊं शकत नाही. दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''ज्यांची ही स्थिती आहे की, मुसलमानांना सोडून, काफिरांना मित्र बनवित फिरतात, काय त्यांच्याजवळ इज्जतीच्या शोधांत जातात, (तर लक्षांत ठेवा की,) इज्जत सर्वच्या सर्व अल्लाहतआलासाठी आहे.'' (सू.अल्‌निसाअ - १३९)

३) 'अल्‌कलिम्' 'कलेमा' चे अनेकवचन आहे. चांगल्या शब्दांनी अभिप्रेत, अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्तुती,

कुरआनाचे वाचन, चांगल्या कामांचा हुकूम करणे, वाईट गोष्टींपासून मना करणे, हे आहेत. 'चढतात' चा अर्थ आहे, मान्य करणे. किंवा ढेवढुतांचे त्यांना घेऊन, आकाशांवर चढणे आहे. कारण की अल्लाहने त्यांना त्यांचा मोबदला द्यावा.

४) 'यरफअहु' मध्ये जमीरचा मरजा कोण आहे? काही म्हणतात अलअमलुसॉलेह तैय्यब आहे. म्हणजे सुकृत्ये, चांगल्या शब्दांना, अल्लाहकडे उंच करतात. म्हणजे निव्वळ तोंडाने अल्लाहचे स्मरण (पावित्र्य वर्णन आणि स्तुती) काही नाही, जो पर्यंत, याच्याबरोबर सुकृत्य म्हणजे आदेश आणि कर्तव्य यांचे अदा करणे, पण नसेल; काही म्हणतात, अल्लाहतआला सुकृत्याला पवित्र शब्दांवर उंच करतो. यासाठी की सुकृत्यानेच या गोष्टीचा पात्र असतो की, याचा करणारा खरोखर अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्तुती प्रांजळपणे करतो. (फत्हुल कदीर) जणुं म्हणणे, कर्मांवाचून, अल्लाहजवळ काही महत्त्व ठेवित नाही.

५) गुप्त रीतीने कोणाला नुकसान पोहचविण्याच्या युक्तीला 'मकर' म्हणतात. कुफ्र आणि शिर्क करणे पण 'मकर' आहे. की, अशाप्रकारे अल्लाहच्या मार्गाला नुकसान पोहचविले जाते. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या विरूद्ध कारस्थाने जसे ठार करणे वगैरे सारखी जी कारस्थाने मक्केचे काफिर करीत राहिले; ते पण 'मकर' आहे. देखावा (लोकांच्या पहाण्यासाठी कर्म करणे) पण मकर आहे. येथे हा शब्द सर्वसाधारण आहे. 'मकर' च्या सर्व प्रकारांना समाविष्ट करतो.

६) म्हणजे यांचे डांव पेच पण नष्ट होतील. आणि त्यांचा वाईट परिणाम पण त्यांच्यावरच पडेल. जे हे डांवपेच लढवितात. जसे सांगितले, ''आणि वाईट डांवपेच करण्याचा परिणाम वाईट डांवपेच करणाऱ्यांवरच पडतो.'' (सू.फातिर – ४३)

७) म्हणजे तुमचे वडील आदम यांना मातीपासून आणि मग तुमच्या वंशाला बाकी ठेवण्यासाठी माणसाच्या निर्मितीला वीर्यबिंढुशी संबंधित करून दिले. जो पुरूषाच्या पाठीतून निघून स्त्रीच्या गर्भाशयात जातो.

८) म्हणजे त्याच्यापासून कुठलीही गोष्ट गुप्त नाही. येथपावेतो की जमिनीवर पडणाऱ्या पानाला, आणि जमिनीच्या अंध:कारांत, पोसल्या जाणाऱ्या बीजाला सुद्धा तो जाणतो. (सू.अन्आम–५९)

९) याचा अर्थ हा आहे की, वय वाढणे किंवा त्याचे कमी होणे, अल्लाहची मन्शा आणि मर्जीने आहे. याशिवाय याची कारणे पण आहेत. ज्यामुळे वय कमी किंवा जास्त होते. वय वाढण्याच्या कारणामध्ये नातेवाईकांशी चांगले संबंध वगैरे पण आहे; जसे की हदीसमध्ये आहे आणि वय कमी होण्याच्या कारणांमध्ये, जास्त गुन्हे करणे आहे. उदाहरणार्थ कोण्या मनुष्यांचे वय ७० वर्षे आहे, परंतु कधी वय वाढण्याच्या कारणांमुळे अल्लाह त्यांच्यात वाढ करून देतो, आणि कधी त्यांच्यात कमी करून टाकतो. जेव्हा तो नुकसान करणाऱ्या सबबीचा अंगीकार करतो. आणि हे सर्व काही त्याच्या लौहे महफूज मध्ये लिहलेले आहे. म्हणून वयांत हे कमी जास्त होणे, ''फ इजा जाअ अज्लहुम् ला यस्तअखिरुन, साअतव् वला यस्तक्दिमून'' च्या विरूद्ध नाही. याचे समर्थन अल्लाहच्या या म्हणण्याने पण होते, ''जे इच्छितो ते मिटवतो आणि (जे इच्छितो) ते बाकी ठेवतो. आणि त्याच्याजवळ लौहे महफूज आहे.'' (सू.रअद – ३९) (फत्हुल कदीर)

१०) 'मवाखिर', ती गलबते जी येता जातांना पाण्याला फाडत जातात. महावाक्यांत वर्णन केलेल्या ढुसऱ्या वस्तुंचा खुलासा सू.फुर्कान मध्ये येऊन चुकला आहे.

११) म्हणजे चर्चित सर्व कामांचा करणारा आहे.

१२) म्हणजे एवढ्या क्षुल्लक वस्तुंचे पण मालक नाही. न त्याला निर्माण करण्यावरच समर्थ आहेत. कित्मीर त्या बारीक पापुद्र्याला म्हणतात. जो खजुर आणि त्याच्या बीच्या दर्म्यान असतो. हा बारिकसा पापुद्रा आठोळीवर पाकीटासारखा चढलेला असतो.

إِنْ تَدْعُوهُمْ لَا يَسْمَعُوا دُعَاءَكُمْ ۚ وَلَوْ سَمِعُوا مَا اسْتَجَابُوا لَكُمْ ۖ وَيَوْمَ الْقِيَامَةِ يَكْفُرُونَ بِشِرْكِكُمْ ۚ وَلَا يُنَبِّئُكَ مِثْلُ خَبِيرٍ ﴿١٤﴾

जर तुम्ही त्यांना बोलवाल, तर ते तुमचे बोलणे ऐकतच नाही;[१] आणि जर समजा, ऐकून पण घेतील, तर मान्य करूंशकत नाहीत.[२] किंबहुना कयामतच्या दिवशी तुमच्या या शिर्कचा स्पष्ट इन्कार करून टाकतील.[३] आपणांस कोणी पण अल्लाहतआलासारखा खबरदार बातम्या देणार नाही.[४] ⑭

يَا أَيُّهَا النَّاسُ أَنْتُمُ الْفُقَرَاءُ إِلَى اللَّهِ ۖ وَاللَّهُ هُوَ الْغَنِيُّ الْحَمِيدُ ﴿١٥﴾

अहो लोकांनो ! तुम्ही अल्लाहची अपेक्षा करणारे आहांत.[५] आणि अल्लाह निरपेक्ष;[६] आणि सुस्तुत्य आहे.[७] ⑮

إِنْ يَشَأْ يُذْهِبْكُمْ وَيَأْتِ بِخَلْقٍ جَدِيدٍ ﴿١٦﴾

जर तो इच्छील तर तुम्हांस नष्ट करून टाकील; आणि एक नवी सृष्टी निर्माण करून टाकीन.[८] ⑯

وَمَا ذَٰلِكَ عَلَى اللَّهِ بِعَزِيزٍ ﴿١٧﴾

आणि ही गोष्ट अल्लाहसाठी काही कठीण नाही. ⑰

وَلَا تَزِرُ وَازِرَةٌ وِزْرَ أُخْرَىٰ ۚ وَإِنْ تَدْعُ مُثْقَلَةٌ إِلَىٰ حِمْلِهَا لَا يُحْمَلْ مِنْهُ شَيْءٌ وَلَوْ كَانَ ذَا قُرْبَىٰ ۗ إِنَّمَا تُنْذِرُ الَّذِينَ يَخْشَوْنَ رَبَّهُمْ بِالْغَيْبِ وَأَقَامُوا الصَّلَاةَ ۚ وَمَنْ تَزَكَّىٰ فَإِنَّمَا يَتَزَكَّىٰ لِنَفْسِهِ ۚ وَإِلَى اللَّهِ الْمَصِيرُ ﴿١٨﴾

कोणी पण ओझे उचलणारा, दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही.[९] जर कोणी, ओझे उचलणारा दुसऱ्याला आपले ओझे उचलण्यासाठी बोलाविल तर तो त्यांच्यातून काही पण उचलणार नाही, जरी नातेवाईकच कांअसेना!![१०] तू फक्त त्यांनाच सावध करूंशकतो, जे बिनपाहिल्या आपल्या पालनकर्त्याला भितात. आणि नमाजीला कायम करतात.[११] आणि जो पण पाकसाफ होईल, तो आपल्याच फायद्यासाठी पवित्र होईल;[१२] अल्लाहकडे परतून जाणे आहे. ⑱

وَمَا يَسْتَوِي الْأَعْمَىٰ وَالْبَصِيرُ ﴿١٩﴾

आणि आंधळा आणि डोळस बरोबर (समान) नाहीत ⑲

وَلَا الظُّلُمَاتُ وَلَا النُّورُ ﴿٢٠﴾

आणि न अंधकार आणि प्रकाश[१३] ⑳

وَلَا الظِّلُّ وَلَا الْحَرُورُ ﴿٢١﴾

न सांवली आणि न ऊन[१४] ㉑

وَمَا يَسْتَوِي الْأَحْيَاءُ وَلَا الْأَمْوَاتُ ۚ إِنَّ اللَّهَ يُسْمِعُ مَنْ يَشَاءُ ۖ وَمَا أَنْتَ بِمُسْمِعٍ مَنْ فِي الْقُبُورِ ﴿٢٢﴾

आणि जिवंत आणि मृत समान होऊं शकत[१५] नाहीत. अल्लाहतआला ज्याला इच्छितो, ऐकवून देतो.[१६] आणि आपण त्या लोकांना, ऐकवूंशकत नाहीत, जे थडग्यांत आहेत.[१७] ㉒

إِنْ أَنْتَ إِلَّا نَذِيرٌ ﴿٢٣﴾

आपण तर फक्त भिवविणारे आहांत[१८] ㉓

إِنَّا أَرْسَلْنَاكَ بِالْحَقِّ بَشِيرًا وَنَذِيرًا ۚ وَإِنْ مِنْ أُمَّةٍ إِلَّا خَلَا فِيهَا نَذِيرٌ ﴿٢٤﴾

आम्हीच आपणांस सत्त्याची शुभवार्ता ऐकविणारा, आणि भिवविणारा बनवून पाठविले आहे; आणि कोणी लोक समूह (उम्मत) असा झाला नाही, ज्याच्यांत कोणी भय दाखविणारा झाला नसेल. ㉔

१) म्हणजे तुम्ही त्यांना जर संकटांत बोलवाल, तर ते तुमचे बोलाविणे ऐकतच नाही. कारण की ते निर्जीव आहेत; किंवा कितीतरी मण माती खाली पुरलेले.

२) म्हणजे समजा जरी त्यांनी ऐकून घेतले तरी काही उपयोग नाही, कारण की ते तुमच्या विनंतीनुसार तुमचे काम करूंशकत नाही.

३) आणि म्हणतील ''तुम्ही आमची उपासना करीत नव्हते.'' (सू.यूनुस-२८) ''आम्हीतर तुमच्या उपासेनपासून बेखबर होतो.'' (सू.यूनुस-२९) या महावाक्याने हे पण ठाऊक होते की, ज्यांची अल्लाहतआलाशिवाय, उपासना केली जाते, त्या सर्व दगडांच्या मुर्त्याच नसतील, किंबहुना त्यांत बुद्धी बाळगणारे, (देवदुत) जिन्न, शैतान, आणि सदाचरणी लोक पण असतील. तेव्हांतर हे इन्कार करतील. आणि हे पण ठाऊक झाले की, यांना इच्छापूर्ती करण्यासाठी बोलावणे शिर्क आहे.

४) यासाठी की,याच्यासारखे संपूर्ण ज्ञान कोणाजवळ पण नाही. तोच सर्व कामांच्या शेवटाला आणि वास्तवतेला

पूर्णपणे जाणतो; ज्यात या बोलाविल्या जाणाऱ्यांना काहीही अधिकार नसणे, बोलाविण्याला न ऐकणे, आणि कयामतच्या दिवशी त्याचा इन्कार करणे पण समाविष्ट आहे.

५) 'नास' (लोक) चा शब्द सर्व साधारण आहे. ज्यात सर्वसाधारण आणि विशेष, येथपावेतो की पैगंबर आणि सदाचरणी सर्व येऊन जातात. अल्लाहच्या दरवाज्याचे सर्वच मोहताज (अपेक्षा बाळगणारे) आहेत. परंतु अल्लाह कोणाचा मोहताज नाही. (निरपेक्ष)

६) तो इतका निरपेक्ष आहे की, सर्व लोक जर त्याचे आज्ञाभंजक होऊन जातील, तर याच्याने त्याच्या राज्यात काही कमी, आणि सर्व जर त्याचे आज्ञाधारक बनून जातील, तर याच्याने त्याच्या सामर्थ्यात वाढ होणार नाही. किंबहुना आज्ञाभंगामुळे माणसांचे आपलेच नुकसान आहे. आणि त्याच्या उपासना आणि आज्ञापालनामुळे माणसांचा आपलाच फायदा आहे.

७) म्हणजे स्त्युत्य आहे, आपल्या देणग्यांमुळे. तर जी देणगी त्याने आपल्या सेवकांना दिली आहे. त्या वर तो स्तुतीस व आभार मानण्यास पात्र आहे.

८) हे पण त्याच्या निरपेक्ष वृत्तीच्या कमालीचे उदाहरण आहे की, जर तो इच्छील तर तुम्हाला नष्ट करून तुमच्या जागी एक नवीन सृष्टी निर्माण करून देईल, जी त्याचे आज्ञापालन करणारी असेल, आज्ञाभंजक नाही. किंवा, हा अर्थ आहे की, एक नवी सृष्टी आणि नवे विश्व, निर्माण करून टाकील, ज्याला तुम्ही जाणत नसाल.

९) होय, परंतु ज्याने दुसऱ्याला बहकविले असेल, तो आपल्या पापांच्या ओझ्याबरोबर, त्यांच्या पापांचे ओझे पण उचलेल जसे की ''अलबत्‌च हे आपले ओझे वाहून घेतील, आणि आपल्या ओझ्यांबरोबरच आणखी ओझी सुद्धां'' (सू.अन्‌कबुत – १३) आणि हदीस ने स्पष्ट आहे. की जो कोणी वाईट कृत्य करेल, त्याचे ओझे त्याच्यावरच असेल. आणि जो कोणी या वाईट कृत्यास अंगीकारेल याचे ओझे पण. (स.मुस्लिम) परंतु हे दुसऱ्यांचे ओझेपण वास्तविक त्यांचे आपलेच ओझे आहे की, त्यांनीच त्या दुसऱ्यांना बहकविले होते.

१०) असा मनुष्य जो पापांच्या ओझ्याने लादलेला असेल, तो आपले ओझे, उचलण्याकरीतांआपल्या नातेवाईकाला पण बोलावेल, तर तो तयार होणार नाही.

११) म्हणजे तुझा उपदेश आणि प्रचाराचा फायदा, त्याच लोकांना होऊं शकतो, जणू तू त्यांनाच भिववित आहेस, त्यांना नाही ज्यांना भिवविण्याचा (उपदेशाचा) काही फायदा होत नाही. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आपण तर फक्त त्याला भिणाऱ्यांनाच सावध करणारे आहांत'' (सू.नाजिआत–४५) आणि, ''बस! आपण तर फक्त, अशा माणसाला भिववूंशकतात, जो उपदेशांवर चालेल, आणि अल्लाहला बिन पाहिल्या शिवाय भीले.'' (सू.यासिन–११)

१२) 'तत्‌हहूर व तजक्की' चा अर्थ आहे, शिर्क आणि वाईट मनोकामनेच्या घाणीपासून, पाक साफ होणे.

१३) आंधळ्याने अभिप्रेत काफिर, आणि डोळस ईमानवाला, अंध:काराने असत्य आणि प्रकाशाने सत्य अभिप्रेत आहे. असत्याचे अनेक प्रकार आहेत. म्हणून याच्यासाठी अनेकवचनाचा, आणि सत्य अनेक नाहीत, एक आहे म्हणून एक वचनाचा उपयोग केला.

१४) हे पुण्यप्रतिफळ आणि शिक्षा किंवा स्वर्ग आणि नर्काची उपमा आहे.

१५) अह्याऊनने, ईमानवाला आणि अमवातने काफिर, किंवा ज्ञानी आणि अडाणी किंवा बुद्धीमान आणि बुद्धीहीन अभिप्रेत आहेत.

१६) म्हणजे ज्याला अल्लाहतआला हिदायत देणार असतो, आणि स्वर्ग त्याच्यासाठी निश्चित केलेला असतो, त्याला तर्क आणि प्रमाणे ऐकणे, आणि मग त्यांना मान्य करण्याची सुबुद्धी देऊन देतो.

१७) म्हणजे ज्याप्रमाणे कबरींत असलेल्या माणसांना कोणी गोष्ट ऐकविली जाऊं शकत नाही; अशाच प्रकारे ज्यांच्या अंत:करणांना कुफ्रने मृतवत करून टाकले आहे, हे पैगंबरा! तूं त्यांना सत्त्याची गोष्ट ऐकवूंशकत नाही. अर्थ हा झाला की ज्याप्रमाणे मेल्यावर आणि कबरीत पुरल्यानंतर मृत काही फायदा उचलूंशकत नाही. अशाच प्रकारे काफिर आणि मुशरिक ज्यांच्या दैवांत दुर्भाग्य लिहलेले आहे, आवाहन आणि प्रचाराने त्यांना फायदा होत नाही.

१८) म्हणजे आपले काम फक्त आवाहन आणि प्रचार आहे. सन्मार्ग आणि बहकणे हे अल्लाहच्या अधिकारांत आहे.

وَاِنْ يُّكَذِّبُوْكَ فَقَدْ كَذَّبَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ ۚ
جَآءَتْهُمْ رُسُلُهُمْ بِالْبَيِّنٰتِ وَبِالزُّبُرِ وَبِالْكِتٰبِ الْمُنِيْرِ ﴿٢٥﴾

आणि जर हे लोक आपणांस खोटे ठरवतील तर जे लोक यांच्यापूर्वी होऊन चुकले आहेत, त्यांनी पण खोटे म्हटले होते.त्यांच्याजवळ सुद्धां त्यांचे पैगंबर चमत्कार आणि संदेश आणि तेजपुंज पुस्तके घेऊन आले होते.⁽१⁾ (२५)

٣ ع ١٢ ١٥ ثُمَّ اَخَذْتُ الَّذِيْنَ كَفَرُوْا فَكَيْفَ كَانَ نَكِيْرِ ﴿٢٦﴾

३ ع १२ १५ मग मी या काफिरांना (शिक्षेत) पकडून घेतले, तर माझी शिक्षा कशी राहिली⁽२⁾ (२६)

اَلَمْ تَرَ اَنَّ اللّٰهَ اَنْزَلَ مِنَ السَّمَآءِ مَآءً ۚ فَاَخْرَجْنَا
بِهٖ ثَمَرٰتٍ مُّخْتَلِفًا اَلْوَانُهَا ؕ وَمِنَ الْجِبَالِ جُدَدٌۢ
بِيْضٌ وَّحُمْرٌ مُّخْتَلِفٌ اَلْوَانُهَا وَغَرَابِيْبُ سُوْدٌ ﴿٢٧﴾

काय आपण या गोष्टीवर दृष्टी टाकली नाही, की अल्लाहतआलाने आकाशांतून पाणी उतारले, मग आम्ही त्याच्याने वेगवेगळ्या रंगाची फळे उपजिविली. [3] आणि पर्वतांचे वेगवेगळे भाग आहेत. पांढरे आणि लाल की, त्यांचे पण निरनिराळे रंग आहेत, आणि पुष्कळसे गडद काळे [4] (आहेत.) (२७)

وَمِنَ النَّاسِ وَالدَّوَآبِّ وَالْاَنْعَامِ مُخْتَلِفٌ اَلْوَانُهٗ
كَذٰلِكَ ؕ اِنَّمَا يَخْشَى اللّٰهَ مِنْ عِبَادِهِ الْعُلَمٰٓؤُا ؕ اِنَّ
اللّٰهَ عَزِيْزٌ غَفُوْرٌ ﴿٢٨﴾

आणि अशाचप्रकारे माणसे आणि प्राणी आणि चतुष्पाद यांच्यातून काही असे आहेत की त्यांचे रंग निरनिराळे आहे. [5] अल्लाहला त्याचे तेच सेवक भितात, जे ज्ञान बाळगतात; [6] खरोखर अल्लाहतआला मोठा सामर्थ्यवान आणि क्षमाकर्ता, आहे. [7] (२८)

اِنَّ الَّذِيْنَ يَتْلُوْنَ كِتٰبَ اللّٰهِ وَاَقَامُوا الصَّلٰوةَ وَاَنْفَقُوْا
مِمَّا رَزَقْنٰهُمْ سِرًّا وَّعَلَانِيَةً يَّرْجُوْنَ تِجَارَةً لَّنْ
تَبُوْرَ ﴿٢٩﴾

जे लोक अल्लाहच्या पुस्तकांचे पठन करतात; [8] आणि नमाज कायम करतात [9] आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेविले आहे, त्याच्यातून गुप्तपणे आणि उघड खर्च करतात; [10] ते अशा व्यापाराची आशा बाळगून आहेत, जो कधी घाट्यात पडणार नाही. [11] (२९)

لِيُوَفِّيَهُمْ اُجُوْرَهُمْ وَيَزِيْدَهُمْ مِّنْ فَضْلِهٖ ؕ اِنَّهٗ
غَفُوْرٌ شَكُوْرٌ ﴿٣٠﴾

कारण की त्यांना त्यांचे मोबदले पूर्ण द्यावेत; आणि त्यांना आपल्या कृपेने, आणखी जास्त देईल; [12] नि:संशय तो मोठा क्षमाकर्ता आणि गुणग्राहक आहे. [13] (३०)

وَالَّذِيْۤ اَوْحَيْنَاۤ اِلَيْكَ مِنَ الْكِتٰبِ هُوَ الْحَقُّ مُصَدِّقًا
لِّمَا بَيْنَ يَدَيْهِ ؕ اِنَّ اللّٰهَ بِعِبَادِهٖ لَخَبِيْرٌۢ بَصِيْرٌ ﴿٣١﴾

आणि हे पुस्तक जे आम्ही वह्य म्हणून आपणाजवळ पाठविले आहे, हे बिलकुल योग्य आहे; [14] जे आपल्या पूर्वीच्या पुस्तकांना खरे ठरवते. [15] अल्लाहतआला आपल्या सेवकांची पूर्णपणे माहिती ठेवणारा, आणि खूप पाहणारा आहे. [16] (३१)

ثُمَّ اَوْرَثْنَا الْكِتٰبَ الَّذِيْنَ اصْطَفَيْنَا مِنْ عِبَادِنَا ۚ
فَمِنْهُمْ ظَالِمٌ لِّنَفْسِهٖ ۚ وَمِنْهُمْ مُّقْتَصِدٌ ۚ وَمِنْهُمْ سَابِقٌۢ
بِالْخَيْرٰتِ بِاِذْنِ اللّٰهِ ؕ ذٰلِكَ هُوَ الْفَضْلُ الْكَبِيْرُ ﴿٣٢﴾

मग आम्ही हे पुस्तक [17] त्या लोकांच्या हातांत पोहचविले ज्यांना आम्ही आपल्या सेवकांमधून पसंत केले आहे; मग त्यांच्यातून काही आपल्या जीवावर जुलूम करणारे आहेत; [18] आणि काही त्यांच्यात मध्यम मार्गावर चालतात. [19] आणि काही त्यांच्यात, अल्लाहच्या आज्ञेने पुण्यांत सरसाऊन जाता; [20] ही मोठीच कृपा आहे. [21] (३२)

१) कारण की कोणी समाजाने हे न म्हणूंशकावे की, आम्हाला ईमान आणि कुफ्र ठाऊकच नाही; यासाठी की, आमच्याजवळ कोणी पैगंबरच आला नाही. म्हणून अल्लाहतआलाने प्रत्येक जनसमूहांत (उम्मतीत) पैगंबर पाठविला. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी पण सांगितले, ''आणि प्रत्येक समाजासाठी हिदायत करणारा आहे.'' (सू.रअद-७) ''आम्ही प्रत्येक समूहामध्ये पैगंबर पाठविला.'' (सू.नहल-३६)

२) म्हणजे कशा कडक शिक्षेने मी त्यांची पकड केली; आणि त्यांना नष्ट करून टाकले.

३) म्हणजे ज्याप्रमाणे ईमानवाला आणि काफिर, सदाचरणी आणि दुराचरणी दोन्ही प्रकारचे लोक आहेत. अशाच प्रकारे दुसऱ्या सृष्टीमध्ये सुद्धां तफावत आणि भेद आहेत. उदाहरणार्थ फळांचे रंग पण वेगवेगळे आहेत. आणि स्वाद लज्जती, आणि सुवास पण एक दुसऱ्यापासून वेगळे आहेत. येथपावेतो की, एकेका फळाचे पण, कितीतरी रंग आणि स्वाद आहेत; जसे खजुर आहेत, द्राक्षे आहेत, सफरचंद आहे, आणि दुसरी काही फळे आहेत.

४) अशाच प्रकारे पर्वत आणि त्याचे भाग किंवा रस्ते आणि रेषा वेगवेगळ्या रंगाच्या आहेत. पांढरे लाल आणि फारच गडद काळे.
५) म्हणजे मनुष्य आणि प्राणीसुद्धा, पांढरे, लाल, काळे आणि पिवळ्या रंगाचे असतात.
६) म्हणजे अल्लाहच्या या सामर्थ्यांना आणि त्याच्या कारागिरीच्या कमालला, तेच जाणूंआणि समजूंशकतात, जे ज्ञान बाळगणारे आहेत. याच ज्ञानाने अभिप्रेत कुरआन व हदीस आणि अल्लाहच्या गुप्तभेदांचे ज्ञान आहे. आणि जेवढी त्यांना अल्लाहची ओळख पटते, तेवढेच ते अल्लाहला भितात. जणूं, ज्याच्यांत ईशभय नाही, समजून घ्या की, खऱ्या ज्ञानापासून ते वंचित आहेत. सुफीयान सूरी म्हणतात की, ज्ञानवंताचे (उल्मां) तीन प्रकार आहेत. एक तो आहे जो अल्लाहला भितो, आणि त्याच्या बांधिव मर्यादा (हदूद) आणि फर्जांना (कर्तव्यांना) जाणतो. दुसरा जो अल्लाहला तर भितो, परंतु त्याच्या बांधिव मर्यादा आणि फर्ज पासून अज्ञानांत आहे. तिसरा जो बांधीव मर्यादा आणि फर्ज जाणतो, परंतु ईशभयापासून रिक्त आहे. (इब्ने कसीर)
७) हे अल्लाहला भिण्याचे कारण आहे की, तो या गोष्टीवर समर्थ आहे की, त्याने आज्ञाभंजकांना शिक्षां द्यावी; आणि तौबा करणाऱ्याचे गुन्हे माफ करून टाकावे.
८) किताबुल्लाह्ने अभिप्रेत कुरआन करीम आहे. 'तिलावत करतात' म्हणजे नियमितपणे, त्याचे वाचन करतात.
९) एकामतिस सलात्‌चा चा अर्थ, नमाज अशा प्रकारे अदा करणे, जी वांच्छनीय आहे. म्हणजे नियमित वेळी, तिचे अरकान व्यवस्थित करणे, नम्रता आणि व्याकुळता (खुशुअ खुजूअ) धारण केली जावी.
१०) म्हणजे उघडपणे आणि गुप्तपणे रात्रंदिवस आवश्यकतेनुसार खर्च करतात. काहींच्या जवळ, गुप्तपणे ऐच्छिक दानधर्म, आणि उघडपणे जकात अभिप्रेत आहे.
११) म्हणजे अशा लोकांचे प्रतिफळ अल्लाहच्या जवळ नक्कीच आहे. जे मंद होण्याची किंवा कमी होण्याची शक्यता नाही.
१२) म्हणजे हा व्यापार मन्दी पासून यासाठी सुरक्षित आहे की, अल्लाहतआला त्यांच्या सुकृत्याचा पुरा पुरा मोबदला देईल. किंवा ते ही चांगली कर्मे, यासाठी करतात, किंवा अल्लाहने त्यांना ती करण्याची हिदायत दिली; कारण की, त्याने त्यांना मोबदला द्यावा.
१३) ही 'तव्फीयह' आणि जास्तीचे कारण, आहे की, तो आपल्या ईमानवाल्या सेवकांचे अपराध क्षमा करणारा आहे; या अटीवर की, त्यांनी प्रांजल मनाने तौबा करावी. त्यांच्या आज्ञापालनाची भावना आणि सुकृत्यांचा तो गुणग्राहक आहे. म्हणून तो फक्त मोबदलाच देणार नाही, किंबहुना आपल्या दया आणि कृपेने आणखी पण देईल.
१४) म्हणजे ज्यावर, तुझ्याकरीता, आणि तुझ्या उम्मत करिता, कर्म करणे आवश्यक आहे.
१५) तौरात आणि इंजील वगैरेंची. हे या गोष्टीचे प्रमाण आहे की, कुरआन करीम त्या अल्लाहकडून अवतरीत झाले आहे, ज्याने मागील पुस्तके; अवतरीत केली होती. तेव्हांच तर, दोन्ही एक दुसऱ्याचे समर्थन आणि खरे ठरवतात.
१६) हा त्याच्या ज्ञान आणि भलाईचा परिणाम आहे की, त्याने नवे पुस्तक अवतरीत करून दिले. कारण की, तो जाणतो , मागील पुस्तक हेरफेर आणि बदल याला बळी पडली आहेत; आणि आतां ती हिदायतच्या लायक राहिली नाहीत.
१७) पुस्तकाने अभिप्रेत कुरआन आणि निवडलेल्या सेवकांनी अभिप्रेत उम्मते मुहम्मदिया आहे. म्हणजे या कुरआनाचा वारस आम्ही उम्मते मुहम्मदियाला बनविले, जिला आम्ही दुसऱ्या उम्मतींच्या तुलनेत, निवडून घेतले; आणि तिला प्रतिष्ठा आणि कृपा बहाल केली. हा जवळ जवळ तोंच भावार्थ आहे, जो महावाक्य,'' आम्ही अशा प्रकारे तुम्हांस न्यायप्रिय उम्मत बनविले आहे की, तुम्ही लोकांवर, साक्षीदार होऊन जावे.'' (सू.बकर : १४३)
१८) उम्मते मुहम्मदियाचे तीन प्रकार वर्णन केले. हा पहिला प्रकार आहे. ज्याच्याने अभिप्रेत असे लोक आहेत, जे काही कर्तव्यास कसूर करतात; आणि काही निषीद्ध गोष्टींचा अंगीकार करून टाकतात. किंवा काही जवळ ते आहेत, जे लहान गुन्हे करतात, त्यांना आपल्या जिवांवर जुलूम करणारे, यासाठी म्हटले गेले की, ते आपल्या काही कोताईमध्ये आपल्याला त्या उच्च दर्जापासून वंचित करून घेतील, जो बाकीच्या दोन प्रकारांना प्राप्त होईल.
१९) हा दुसरा प्रकार आहे; म्हणजे सरमिसळ कर्मे करतात. किंवा काहींजवळ ते आहेत, जे फर्ज नियमितपणे पार पाडतात, निषीद्ध गोष्टींना तर्क तर करतात, परंतु कधी (हुजूर करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम ची आवडती कृत्ये) मुस्तहब्बांत ला तर्क, आणि निषीद्ध गोष्टींचा अंगीकार पण त्यांच्या कडून होऊन जातो; किंवा ते आहेत, जे सदाचरणी तर आहेत, पण त्यांत सरसावून पुढे जाणारे नाहीत.
२०) हे ते आहेत, जे धर्माच्या बातीत, मागल्या दोहोपेक्षां पुढे जाणारे आहेत.
२१) म्हणजे पुस्तकाचा वारस करणे, आणि प्रतिष्ठेत व कृपेत निवडून घेणे.

جَنّٰتُ عَدۡنٍ يَّدۡخُلُوۡنَهَا يُحَلَّوۡنَ فِيۡهَا مِنۡ اَسَاوِرَ
مِنۡ ذَهَبٍ وَّلُؤۡلُؤًا ۚ وَلِبَاسُهُمۡ فِيۡهَا حَرِيۡرٌ ﴿٣٣﴾

**त्या नित्य राहण्याच्या बागा आहेत, ज्यांत हे लोक दाखल होतील.** [१] **सोन्याची कंकणे आणि मोती (त्यांना) लेवविली जातील. आणि तेथे त्यांचा पोषाख रेशमाचा असेल.** [२] ३३

وَقَالُوا الۡحَمۡدُ لِلّٰهِ الَّذِىۡۤ اَذۡهَبَ عَنَّا الۡحَزَنَ ؕ اِنَّ
رَبَّنَا لَغَفُوۡرٌ شَكُوۡرُ ۙ﴿٣٤﴾

**आणि ते म्हणतील अल्लाहचे लाख लाख आभार! ज्याने आमच्यापासून दु:ख दूर केले. नि:संशय आमचा पालनकर्ता मोठा क्षमाकर्ता आणि गुणग्राहक आहे.** ३४

اِۨلَّذِىۡۤ اَحَلَّنَا دَارَ الۡمُقَامَةِ مِنۡ فَضۡلِهٖ ۚ لَا يَمَسُّنَا
فِيۡهَا نَصَبٌ وَّلَا يَمَسُّنَا فِيۡهَا لُغُوۡبٌ ﴿٣٥﴾

**ज्याने आम्हाला आपल्या कृपेने, नेहमी राहण्याच्या जागी आणून उतारले; जेथे न आम्हास कोणी त्रास होईल, न आम्हांस काही थकवा जाणवेल** ३५

وَالَّذِيۡنَ كَفَرُوۡا لَهُمۡ نَارُ جَهَنَّمَ ۚ لَا يُقۡضٰى عَلَيۡهِمۡ
فَيَمُوۡتُوۡا وَلَا يُخَفَّفُ عَنۡهُمۡ مِّنۡ عَذَابِهَا ؕ كَذٰلِكَ
نَجۡزِىۡ كُلَّ كَفُوۡرٍ ۚ﴿٣٦﴾

**आणि जे लोक काफिर आहेत, त्यांच्याकरीता नरकाग्नीची आग आहे; न तर त्यांना मृत्युच येईल, की मरून जावे न नरकाग्नीची शिक्षा त्यांच्यावरून हलकी केली जाईल. आम्ही प्रत्येक काफिराला अशीच शिक्षा देत असतो.** ३६

وَهُمۡ يَصۡطَرِخُوۡنَ فِيۡهَا ۚ رَبَّنَاۤ اَخۡرِجۡنَا نَعۡمَلۡ صَالِحًا
غَيۡرَ الَّذِىۡ كُنَّا نَعۡمَلُ ؕ اَوَلَمۡ نُعَمِّرۡكُمۡ مَّا يَتَذَكَّرُ
فِيۡهِ مَنۡ تَذَكَّرَ وَجَآءَكُمُ النَّذِيۡرُ ؕ فَذُوۡقُوۡا فَمَا لِلظّٰلِمِيۡنَ
مِنۡ نَّصِيۡرٍ ﴿٣٧﴾

**आणि ते लोक याच्यांत ओरडून म्हणतील, की हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला काढून घे, आम्ही चांगली कामे करू; त्या कामांच्या विरूद्ध जे करीत होतो.** [३] **(अल्लाह म्हणेल) काय आम्ही तुम्हांस एवढे वय दिले नव्हते की, ज्याला समजावयाचे होते,** [४] **तो समजू शकला असता; आणि तुमच्याजवळ भिवविणारा पण पोहचला होता.** [५] **तर (आता शिक्षेची) गोडी चाखा की, अशा जालीमांचा कोणी मददगार नाही.** ३७

४ ११ १६

१) काही म्हणतात की, स्वर्गांत फक्त पूर्वींचे (साबिकून) लोक जातील; परंतु हे बरोबर नाही. कुरआनाचे म्हणणे या गोष्टीला मान्य करतो की, तिन्ही प्रकार स्वर्गवासी आहे. ही वेगळी गोष्ट आहे की, पूर्वींचे (साबिकून) लोक हिशोबाशिवाय आणि मुकत्सिदीन सोप्या हिशेबानंतर, आणि जालीम लोक शिफारसीने किंवा शिक्षा भोगून स्वर्गांत जातील. जसे की, हदीशींनी स्पष्ट आहे. मुहम्मद बिन हनफिया चे म्हणणे आहे, ''ही उम्मत, दया केली गेलेली आहे, जालीम म्हणजे गुन्हेगार लोकांना क्षमा करून टाकण्यांत येईल. मध्यम माणूस अल्लाहच्या तेथे स्वर्गांत असेल. आणि त्यांनी सर्वांत प्रथम इस्लाम कबूल केला ते लोक उच्च दर्जात विराजमान होतील. (इब्ने कसीर) गुन्हेगाराच्या मगफिरतीचा अर्थ शेवटी क्षमाच आहे, शिक्षा भोगूप किंवा त्याच्याशिवाय अल्लाहच्या दयेने व कृपेने.

२) हदीशीत येते की, ''रेशीम आणि दीबाज जगांत लेवूं नका; यासाठी जो याला घालेल, तो परलोकांस याला घालणार नाही.'' (स.बुखारी व स.मुस्लिम)

३) म्हणजे इतरांशिवाय तुझी उपासना, आणि अपराधांच्या ऐवजी तुझे आज्ञापालन करू.

४) याच्याने अभिप्रेत किती वय आहे ? भाष्यकारांनी वेगवगळी वये सांगितली आहेत. काहींनी काही हदीशींचा आधार घेत, म्हटले आहे की, ६० वर्षांचे वय अभिप्रेत आहे. (इब्ने कसीर) परंतु, आमच्या विचारांत वयाचे निश्चित करणे बरोबर नाही; या करीतां की, वये वेगवेगळी असतात. कोणी तारूण्यांत, कोणी प्रौढावस्थेत, कोणी म्हातारपणी मरून जातो. मग हे काळपण निघून गेलेल्या क्षणांसारखे संक्षिप्त असत नाही. प्रत्येक काळ बराच दिर्घ असतो. उदाहरणार्थ तारूण्याचा काळ, वयांत येण्यापासून प्रोढावस्थापर्यंत आणि प्रौढावस्थेचा काळ वृद्धत्वापर्यंत, आणि वृद्धत्वाचा काळ मृत्युपर्यंत रहातो. कोणाला चिंतन मनन करण्याला, उपदेश ग्रहण करण्याला आणि परिणाम जाणून घेण्यांकरतां, थोडी वर्षे, कोणाला याच्या पेक्षांजास्त, आणि कोणाला याच्यापेक्षा सुद्धा जास्त वर्षे मिळतात. आणि सर्वांना हा प्रश्न विचारणे बरोबर असेल की, आम्ही तुला ऐवढे वय दिले होते की जर तूंसत्त्याला समजूंइच्छितां, तर समजुं शकत होता; मग तूं सत्त्याला समजणे आणि त्याचा अंगीकार करण्याचा प्रयत्न कां केला नाही ?

५) याच्याने अभिप्रेत नबी करीम ﷺ, आहेत. म्हणजे स्मरण करून देणे आणि उपदेशांकरीतांपैगंबर आणि त्याच्या व्यासपिठाचे वारस धर्मपंडीत (उल्मा) आणि समजाविणारे तुझ्याजवळ आलेत, परंतु तूंआपल्या बुद्धी आणि समजने काम घेतले नाही. आणि सत्त्याच्या आवाहकांच्या गोष्टीकडे लक्ष दिले नाही.

إِنَّ اللَّهَ عَٰلِمُ غَيْبِ السَّمَٰوَٰتِ وَالْأَرْضِ ۚ إِنَّهُۥ عَلِيمٌۢ بِذَاتِ الصُّدُورِ ٣٨

नि:संशय अल्लाहतआला जाणणारा आहे, आकाश आणि पृथ्वीच्या गुप्त गोष्टींचा;[१] नि:संशय मनातील गोष्टींचा[२] तोच जाणणारा आहे. ३८

هُوَ الَّذِي جَعَلَكُمْ خَلَٰٓئِفَ فِي الْأَرْضِ ۚ فَمَن كَفَرَ فَعَلَيْهِ كُفْرُهُۥ ۖ وَلَا يَزِيدُ الْكَٰفِرِينَ كُفْرُهُمْ عِندَ رَبِّهِمْ إِلَّا مَقْتًا ۖ وَلَا يَزِيدُ الْكَٰفِرِينَ كُفْرُهُمْ إِلَّا خَسَارًا ٣٩

तोच असा आहे, ज्याने तुम्हांस पृथ्वीत वसविले; तर जो मनुष्य कुफ्र करेल, त्याच्या कुफ्रचे ओझे त्याच्यावर पडेल. आणि काफिरांकरीतां त्यांचे कुफ्र त्यांच्या पालनकर्त्याजवळ अप्रसन्नता वाढविण्यालाच कारणीभूत होते. आणि काफिरांकरीतां त्यांचे कुफ्र तोटाच वाढविण्याला कारणीभूत होते.[३] ३९

قُلْ أَرَءَيْتُمْ شُرَكَآءَكُمُ الَّذِينَ تَدْعُونَ مِن دُونِ اللَّهِ أَرُونِي مَاذَا خَلَقُوا مِنَ الْأَرْضِ أَمْ لَهُمْ شِرْكٌ فِي السَّمَٰوَٰتِ أَمْ ءَاتَيْنَٰهُمْ كِتَٰبًا فَهُمْ عَلَىٰ بَيِّنَتٍ مِّنْهُ ۚ بَلْ إِن يَعِدُ الظَّٰلِمُونَ بَعْضُهُم بَعْضًا إِلَّا غُرُورًا ٤٠

आपण यांना विचारा की, तुम्ही आपणच ठरविलेल्या सरकतदारांची अवस्था तर सांगा; ज्यांची तुम्ही अल्लाहच्या शिवाय पुजा करतात; म्हणजे मला हे सांगा की,त्यांनी पृथ्वीचा कोणता भाग बनविला आहे, किंवा त्यांची आकाशांत काही भागिदारी आहे; किंवा आम्ही त्यांना कोणी पुस्तक दिले आहे की, ते याच्या प्रमाणावर कायम असावेत?[४] किंबहुना हे जालीम एक दुसऱ्याशी निव्वळ फसवणुकीच्या गोष्टीचा वायदा करीत आले आहेत[५] ४०

إِنَّ اللَّهَ يُمْسِكُ السَّمَٰوَٰتِ وَالْأَرْضَ أَن تَزُولَا ۚ وَلَئِن زَالَتَا إِنْ أَمْسَكَهُمَا مِنْ أَحَدٍ مِّنۢ بَعْدِهِۦٓ ۚ إِنَّهُۥ كَانَ حَلِيمًا غَفُورًا ٤١

ही गोष्ट निश्चित आहे की, अल्लाहतआला आकाश आणि पृथ्वीला सांवरून आहे की, त्यांनी सद्य स्थितीला सोडून न द्यावे.[६] आणि जर ते सद्य स्थितीला सोडून पण देतील, तर मग अल्लाहच्या शिवाय, आणखी कोणी त्यांना सावंरू शकत नाही.[७] तो दर्याद्र (हलीम) आणि क्षमाकर्ता आहे.[८] ४१

وَأَقْسَمُوا بِاللَّهِ جَهْدَ أَيْمَٰنِهِمْ لَئِن جَآءَهُمْ نَذِيرٌ لَّيَكُونُنَّ أَهْدَىٰ مِنْ إِحْدَى الْأُمَمِ ۖ فَلَمَّا جَآءَهُمْ نَذِيرٌ مَّا زَادَهُمْ إِلَّا نُفُورًا ٤٢

आणि या काफिरांनी फार मोठी शपथ खाल्ली होती की, जर त्यांच्याजवळ कोणी भिवविणारा आला तर ते प्रत्येक उम्मतीपेक्षां जास्त हिदायत मान्य करणारे असतील.[९] मग जेव्हां त्यांच्याजवळ एक पैगंबर येऊन पोहचले,[१०] तेव्हा मग याच्या तिरस्कारातच वाढ झाली ४२

اسْتِكْبَارًا فِي الْأَرْضِ وَمَكْرَ السَّيِّئِ ۚ وَلَا يَحِيقُ الْمَكْرُ السَّيِّئُ إِلَّا بِأَهْلِهِۦ ۚ فَهَلْ يَنظُرُونَ إِلَّا سُنَّتَ الْأَوَّلِينَ ۚ فَلَن تَجِدَ لِسُنَّتِ اللَّهِ تَبْدِيلًا ۖ وَلَن تَجِدَ لِسُنَّتِ اللَّهِ تَحْوِيلًا ٤٣

जगांत, आपल्याला मोठा समजण्याच्या कारणामुळे,[११] आणि यांच्या वाईट युक्त्यांमुळे[१२] आणि वाईट युक्त्यांचे ओझे युक्तीवाल्यांवरच पडत असते;[१३] तर काय हे, त्याच वर्तनाची वाट पहात आहेत, जे पूर्वीच्या लोकांबरोबर होत राहिले आहे.[१४] तर आपण अल्लाहचा कायदा कधीही बदलतांना पावणार नाही.[१५] आणि आपण अल्लाहच्या कायद्याला कधीही टळतांना पावणार नाही.[१६] ४३

१) येथे हे सांगण्याचा उद्देश्य हा पण असूंशकतो की, तुम्ही दुसऱ्यांदा जगांत जाण्याची आकांक्षा करीत आहात, आणि दावा करीत आहात की, आता आज्ञाभंगाच्या जागी आज्ञापालन, आणि शिर्कच्या जागेवर एकेश्वरवादाचा अंगीकार करू. परंतु आम्हांस ज्ञान आहे की, तुम्ही असे करणार नाही. तुम्हास जरी दुसऱ्यांदा जगांत पाठवून पण दिले जाईल, तर तुम्ही तेच काही कराल जे पूर्वी करत राहिला आहांत. जसे दुसऱ्यां ठिकाणी अल्लाहने फर्माविले, ''जर त्यांना दुसऱ्यांदा जगांत पाठवून दिले जाईल, तर तेच काम करतील, ज्यापासून त्यांना मना केले गेले होते.'' (सू.अन्आम-२८)

२) हे मागच्या गोष्टीकडे लक्ष वेधणे आहे. म्हणजे अल्लाहतआलाला आकाश आणि पृथ्वीच्या गुप्त गोष्टींचे ज्ञान कां नसावे.जेव्हांकी, तो अंत:करणातील गुप्त गोष्टी आणि गुप्तभेदांशी पण वाकबगार आहे; जे सर्वांत जास्त गुप्त असतात.

३) म्हणजे अल्लाहच्या येथे कुफ्र काही फायदा पोहचविणार नाही. किंबहुना याच्याने अल्लाहच्या प्रकोपांत आणि अप्रसन्नतेमध्ये आणखी वाढ होईल. आणि माणसाच्या आपल्या जिवाचा तोटा पण जास्त.

४) म्हणजे आम्ही यांच्यावर काही पुस्तक अवतरीत केले असावे. ज्याच्यांत हे नमुद असावे की, माझे पण कोणी सरकतदार आहेत. जे आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीत भागीदार आणि शामील आहेत.

५) म्हणजे याच्यातून कुठलीच गोष्ट नाही. किंबहुना हे आपसातच, एक दुसऱ्याला बहकवीत आले आहेत. यांचे पुढारी आणि गुरू म्हणत असत की, हे उपास्य त्यांना नफा पोहचवितील. त्यांना अल्लाहच्या जवळ करून देतील. आणि त्यांची शिफारस करतील. किंवा या गोष्टी शैतान मुशरिकांना सांगत होते. किंवा याच्याने तो वायदा अभिप्रेत आहे, ज्याला ते एक दुसऱ्यासमोर जाहीर करीत होते, की ते मुसलमानांवर वरचढ राहतील, ज्यामुळे त्यांना आपल्या कुफ्रवर अडिग राहण्याची हिंमत मिळत होती.

६) हे अल्लाहतआलाच्या असीम सामर्थ्याचे आणि कारागिरीचे वर्णन आहे. काहींनी म्हटले, अर्थ हा आहे की, यांच्या शिर्कचा तगादा आहे की, आकाश आणि पृथ्वी आपल्या स्थितीवर कायम न रहावी, तुटून फुटून जाण्याला बळी पडावी. जसे महावाक्य, ''की जिच्यामुळे जवळ आहे की, आकाश फाटून पडतील आणि धरणी दुभंगून जाईल, आणि पर्वत तुकडे तुकडे होऊन कोसळतील की लोकांनी परम दयाळू अल्लाहस पुत्र आहे असा आरोप केला.'' (सू.मर्यम ९०-९१)

७) म्हणजे हे अल्लाहच्या असीम सामर्थ्याबरोबर त्याची असीम दया पण आहे की, तो आकाश आणि पृथ्वीला सावरून आहे; आणि त्यांना आपल्या जागेवरून डांवाडौल होऊं देत नाही. नाही तर क्षणांत जगाचे व्यवस्थापन नष्ट होऊन जाईल. कारण की, जर ते आवरणार नाही. ठेवणार नाही, आणि त्यांना आपल्या जागेवरून फिरवून टाकेल, तर अल्लाहशिवाय कोणी व्यक्तीत्व नाही, जो यांना आवरून घेईल. 'इन् अमसकहुमा' मध्ये 'इन्' 'नाफिया' आहे. अल्लाहने आपले हे उपकार आणि निशाणींची चर्चा, दुसऱ्या ठिकाणांवर सुद्धां केली आहे. उदाहरणार्थ, ''त्यानेच आकाशाला जमिनीवर पडण्यापासून रोकून धरले आहे, परंतु जेव्हां त्याचा हुकूम होईल.'' (सू.हज्ज-६५) ''त्याच्या निशाण्यामधून आहे की, आकाश आणि पृथ्वी त्याच्या हुकुमाने कायम आहेत.'' (सू.रूम-२५)

८) इतके सामर्थ्य असून सुद्धा तो सहसा न रागवणारा आहे. आपल्या सेवकांना पहातो की, ते कुफ्र व शिर्क आणि आज्ञाभंजन करीत आहेत. तरी सुद्धा तो त्यांची पकड करण्यांत घाई करीत नाही; किंबहुना अवकाश देतो. आणि क्षमाकर्तापण आहे; कोणी पश्चात्ताप व्यक्त करून, त्याच्या समक्ष झुकतो, क्षमायाचना आणि पश्चात्ताप जाहीर करतो, तर तो त्याला क्षमा करून टाकतो.

९) याच्यांत अल्लाहतआला सांगत आहे की, ह.मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला पाठविण्यापूर्वी, अरबचे मुशरिक शपथा वाहून वाहून म्हणत असत की, जर आमच्याकडे कोणी पैगंबर आला तर आम्ही त्याचे स्वागत करूं. आणि त्याच्यावर ईमान आणण्यात एक नमुन्याचे कर्तृत्व करू. हा विषय दुसऱ्या ठिकाणी पण सांगण्यांत आला आहे. उदाहरणार्थ सू.अन्आम-१५६-१५७ सू.साफात - १६७-१७०)

१०) म्हणजे ह.मुहम्मद ﷺ, त्यांच्याजवळ पैगंबर बनून येऊन लागले. ज्यांच्या करीतां ते आकांक्षा बाळगत होते.

११) म्हणजे आपल्या पैगंबरीवर ईमान आणण्याच्या ऐवजी नाकारण्याचा आणि विरोध करण्याचा मार्ग निव्वळ अहंकार आणि शिरजोरीमुळे अंगीकारला.

१२) आणि वाईट युक्ती म्हणजे, फसवणूक, धोका आणि वाईट कृत्यांच्यामुळे केली.

१३) म्हणजे लोक डांवपेच आणि फसवणूक करतात; परंतु, त्यांना हे ठाऊक नाही, की वाईट युक्तीचा परिणाम वाईटच होतो. आणि याचा दुष्परिणाम सरशेवटी, डांवपेच आणि फसवणूक करणाऱ्यावरच पडतो.

१४) म्हणजे काय हे, आपले कुफ्र व शिर्क पैगंबरांचा विरोध, आणि ईमानवाल्यांना त्रास देण्यावर अडून राहून, या गोष्टीची वाट पाहतात की, त्यांना पण, त्या प्रमाणे नष्ट करण्यांत यावे, ज्याप्रमाणे मागील लोक नष्ट करण्यांत आले ?

१५) परंतु हे अशाचप्रकारे चालूंआहे, आणि पाखंड्याचे दैवी, नष्ट होणे आहे. किंवा बदलण्याचा अर्थ हा आहे की, कोणी मनुष्य अल्लाहच्या शिक्षेला, दयेत बदलण्यांस समर्थ नाही.

१६) म्हणजे कोणी अल्लाहच्या शिक्षेला दूर करणारा, किंवा त्याची दिशा बदलणारा, नाही. म्हणजे ज्या लोकांना अल्लाह शिक्षेत ग्रस्त करूं इच्छील, कोणी तिची दिशा कोण्या दुसऱ्या लोकांकडे फिरवून देईल, अशी कोणांत शक्ती नाही अर्थ, अल्लाहच्या या रीतीच्या खुलाशाने अरबच्या मुशरिक लोकांना भिवविणे आहे की, आतांसुद्धां वेळ आहे, त्यांनी कुफ्र शिर्क सोडून ईमान घेऊन यावे. नाहीतर ते अल्लाहच्या या रितीने वांचू शकत नाही. केव्हांना केव्हा इच्या मान्यांत येऊन लागतील. कोणी पण अल्लाहच्या या कायद्याला बदलण्याला समर्थ नाही. आणि अल्लाहच्या शिक्षेला फिरवण्यावर सुद्धा समर्थ नाही.

أَوَلَمْ يَسِيرُوا فِي الْأَرْضِ فَيَنظُرُوا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الَّذِينَ مِن قَبْلِهِمْ وَكَانُوا أَشَدَّ مِنْهُمْ قُوَّةً ۚ وَمَا كَانَ اللَّهُ لِيُعْجِزَهُ مِن شَيْءٍ فِي السَّمَاوَاتِ وَلَا فِي الْأَرْضِ ۚ إِنَّهُ كَانَ عَلِيمًا قَدِيرًا ﴿٤٤﴾

**आणि काय हे लोक जमिनीवर चालत फिरत नाहीत, जिच्यांत पहाते संवरते की, जे लोक यांच्यापूर्वी येऊन चुकले आहेत, त्यांचा परिणाम काय झाला? वास्तविक ते शक्तीमध्ये यांच्यापेक्षां जास्त होते. आणि अल्लाह असा नाही की, आकाश आणि पृथ्वीत कोणी गोष्ट त्याला हरवूंशकेल. नि:संशय तो मोठा ज्ञाता आणि मोठा सामर्थ्यवान आहे** (४४)

وَلَوْ يُؤَاخِذُ اللَّهُ النَّاسَ بِمَا كَسَبُوا مَا تَرَكَ عَلَىٰ ظَهْرِهَا مِن دَابَّةٍ وَلَٰكِن يُؤَخِّرُهُمْ إِلَىٰ أَجَلٍ مُّسَمًّى ۖ فَإِذَا جَاءَ أَجَلُهُمْ فَإِنَّ اللَّهَ كَانَ بِعِبَادِهِ بَصِيرًا ﴿٤٥﴾

**आणि जर अल्लाहतआला लोकांना त्यांच्या कर्माबद्दल धरतां तर जमिनीच्या पृष्ठावर एक प्राण्याला पण न सोडता; [१] परंतु अल्लाहतआला यांना, एका ठराविक वेळेपर्यंत अवकाश देत [२] आहे; मग जेव्हा त्याचा तो काळ येऊन पोहोचेल, अल्लाहतआला आपल्या सेवकांना स्वत: पाहून घेईल. [३]** (४५)

آياتها ٨٣ (٣٦) سُورَةُ يسٓ مَكِّيَّةٌ (٤١) رُكُوعَاتُهَا ٥

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

## (३६) सू. यासीन

महावाक्ये ८३ | रुकूअ ५

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

يسٓ ﴿١﴾

**यासीन[४]** (१)

وَالْقُرْآنِ الْحَكِيمِ ﴿٢﴾

**ज्यांत प्रबद्धपणाच्या[५] गोष्टी आहेत, त्या कुरआनाची शपथ** (२)

إِنَّكَ لَمِنَ الْمُرْسَلِينَ ﴿٣﴾

**नि:संशय आपण इतर पैगंबरांपैकीच आहात[६]** (३)

१) मनुष्यांना तर त्यांच्या अपराधांच्या बदल्यांत, आणि जनावरांना मनुष्याच्या दुष्परिणामामुळे. किंवा अर्थ आहे की, तमाम जमिनीवरील प्राण्यांना नष्ट करून टाकता. मनुष्यांना सुद्धा, आणि जनावरांना आणि ज्या अन्नसंपत्तीचे ते मालक आहेत त्यांना सुद्धा. किंवा अर्थ आहे की, आकाशांतून पाऊस पडण्याचा क्रम खंडीत करून टाकला असता, ज्यामुळे जमिनीवर चालणारी सर्व जनावरे मरून गेली असती.

२) ही निश्चित वेळ जगात पण होऊ शकते; आणि कयामतचा दिवस तर आहेच.

३) म्हणजे त्या दिवशी त्यांचा हिशेब घेईल; आणि प्रत्येक माणसाला, त्याच्या कर्मांचा पुरा पुरा बदला देईन. ईमानवाले आणि आज्ञापालन करणारे यांना मोबदला आणि पुण्य प्रतिफळ, आणि कुफ्रवाले आणि गुन्हेगार यांना प्रताडना आणि शिक्षा. याच्यांत ईमानवाल्यांसाठी सांत्वना आहे; आणि काफिरांसाठी धमकी.

✿ सू.यासीनच्या महात्म्यांमध्ये पुष्कळशा रिवायती प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ हे कुरआनाचे हृदय आहे; याला जो मनुष्य मृत्यूच्या जवळ आहे, त्यावर वांचा; वगैरे. परंतु सनदीच्या दृष्टीने कोठलीही रिवायत, बरोबर असण्याच्या दर्जाला पोहचत नाही. काही बिल्कुल रचलेल्या आहेत. आणि काही फार दुर्बल आहेत. कुरआनाच्या हृदयाची रिवायतीला शेख अल्बानीने 'मव्जुअ' (मनघडत) म्हटले आहे. (अलजईफा हदीस क्र.१६९)

४) काहींनी याचा अर्थ, या 'रजुल या इन्सान' केला आहे. काहींनी यास नबी करीम (सल्ल.) चे नाव आणि काहींनी त्यास अल्लाहतआलाच्या उत्कृष्ठ नांवापैकी दाखविले आहे. परंतु हे सर्व बिनाप्रमाण आहे. हे पण त्या शब्दांमधूनच आहे, ज्यांचा अर्थ व भावार्थ अल्लाहशिवाय कोणीच जाणत नाही.

५) किंवा मजबूत कुरआनाची जे काव्य आणि अर्थपूर्णतेच्या अनुषंगाने मजबूत आणि पक्के आहे. 'वाव' शपथेसाठी आहे.

६) मुशरिक लोक, नबी सल्ललाहु अलैहि व सल्लमच्या पैगंबरीत शंका घेत होते. म्हणून, आपल्या पैगंबरीचा इन्कार करीत आणि म्हणत, ''तूं तर पैगंबरच नाही.'' (सू.रअद-४३) अल्लाहने याच्या उत्तरांत, कुरआन हकीमची शपथ खाऊन सांगितले की, आपण (सल्ल.) खचित्‌च त्याच्या पैगंबरामधून आहांत. याच्यात आपली प्रतिष्ठा आणि महात्म्याचे जाहीर करणे आहे. अल्लाहतआलाने कोण्या पैगंबराच्या पैगंबरीच्यासाठी शपथ खाल्ली नाही. हे पण आपल्या वेगळेपणांत, आणि खास वैशिष्ट्यांत आहे; की, अल्लाहतआलाने आपली (सल्ल.) पैगंबरी सिद्ध करण्यासाठी शपथ खाल्ली. सल्लल्लाहु अलैहि व सल्लम.

عَلٰى صِرَاطٍ مُّسْتَقِيْمٍ ۝٤

**सरळ मार्गावर आहांत[१] ४**

تَنْزِيْلَ الْعَزِيْزِ الرَّحِيْمِ ۝٥

**हे कुरआन सामर्थ्यवान आणि दयाळू अल्लाहकडून अवतरीत झाले आहे[२] ५**

لِتُنْذِرَ قَوْمًا مَّآ اُنْذِرَ اٰبَآؤُهُمْ فَهُمْ غٰفِلُوْنَ ۝٦

**कारण की, आपण अशा लोकांस भिववावे, ज्यांचे आईवडील भिवविले गेले नव्हते; म्हणून ते याच्याकडून गाफील आहेत. [३] ६**

لَقَدْ حَقَّ الْقَوْلُ عَلٰٓى اَكْثَرِهِمْ فَهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ۝٧

**यांच्यातून बहुतेक लोकांवर गोष्ट सिद्ध होऊन चुकली आहे; म्हणून हे लोक ईमान आणणार नाहीत. [४] ७**

اِنَّا جَعَلْنَا فِيْٓ اَعْنَاقِهِمْ اَغْلٰلًا فَهِيَ اِلَى الْاَذْقَانِ فَهُمْ
مُّقْمَحُوْنَ ۝٨

**आम्ही यांच्या गळ्यांत मानखोडे घालून टाकले आहेत, ते हनुवटयापर्यंत आलेले आहेत; ज्यामुळे त्यांची डोकी वर ताठून गेलेली आहेत[५] ८**

وَجَعَلْنَا مِنْۢ بَيْنِ اَيْدِيْهِمْ سَدًّا وَّمِنْ خَلْفِهِمْ سَدًّا
فَاَغْشَيْنٰهُمْ فَهُمْ لَا يُبْصِرُوْنَ ۝٩

**आणि आम्ही एक आड, त्यांच्यासमोर करून दिली; आणि एक आड त्यांच्या मागे करून दिली. [६] ज्यामुळे आम्ही त्यांना घेरून टाकले; [७] म्हणून ते पाहू शकत नाहीत ९**

وَسَوَآءٌ عَلَيْهِمْ ءَاَنْذَرْتَهُمْ اَمْ لَمْ تُنْذِرْهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ۝١٠

**आणि त्यांच्या बाबतीत, त्यांना आपले भिवविणे किंवा न भिवविणे, दोन्हीही समान आहेत; हे ईमान आणणार नाहीत. [८] १०**

اِنَّمَا تُنْذِرُ مَنِ اتَّبَعَ الذِّكْرَ وَخَشِيَ الرَّحْمٰنَ بِالْغَيْبِ ۚ
فَبَشِّرْهُ بِمَغْفِرَةٍ وَّاَجْرٍ كَرِيْمٍ ۝١١

**आपण तर फक्त अशा माणसाला, भिववूंशकता, जो उपदेशावर चालेल, आणि रहमानला पाहिल्याशिवाय भिईल; तर आपण त्याला क्षमा आणि उत्कृष्ट मोबदल्याची खुषखबर ऐकवून द्या. ११**

اِنَّا نَحْنُ نُحْيِ الْمَوْتٰى وَنَكْتُبُ مَا قَدَّمُوْا وَاٰثَارَهُمْ ۣ وَكُلَّ
شَيْءٍ اَحْصَيْنٰهُ فِيْٓ اِمَامٍ مُّبِيْنٍ ۝١٢

**नि:संशय आम्ही मृतांना जिवंत करू; [९] आणि आम्ही लिहीत जातो, त्या कर्मांना पण ज्यांना, लोक पुढे पाठवतात. [१०] आणि त्यांची ती कर्मेपण, ज्यांना मागे सोडून जातात. आणि आम्ही प्रत्येक गोष्टीला एका स्पष्ट पुस्तकांत नोंदविलेले आहे. [११] १२**

وَاضْرِبْ لَهُمْ مَّثَلًا اَصْحٰبَ الْقَرْيَةِ ۘ اِذْ جَآءَهَا
الْمُرْسَلُوْنَ ۝١٣

**आणि आपण त्यांच्यासमोर म्हणजे एका वस्तीवाल्यांचे उदाहरण त्या वेळची वर्णन करा, जेव्हा की, त्या वस्तीत, कित्येक पैगंबर आलेत[१२] १३**

१) ही 'इन्नका' ची दुसरी बातमी आहे. म्हणजे आपण त्या पैगंबरांच्या मार्गावर आहांत, जे पहिले होऊन चुकले. किंवा अशा मार्गावर आहे, जो सरळ, आणि वांच्छनीय ध्येया (स्वर्ग) प्रत पोहचविणारा आहे.

२) म्हणजे त्या अल्लाहकडून अवतरीत झाले आहे, जो सामर्थ्यवान आहे. म्हणजे त्याचा इन्कार करणारा, आणि त्याच्या पैगंबराला खोटे म्हणणारा, याचे कडून बदला घेण्यांस अजीज (समर्थ) आहे. 'रहीम' आहे; म्हणजे जो याच्यावर ईमान आणील, आणि त्याचा भक्त बनून राहील, त्याच्यासाठी फारच मेहेरबान आहे.

३) म्हणजे आपणास पैगंबर यासाठी बनविले आहे, आणि हे पुस्तक यासाठी अवतरीत केले आहे, की आपण त्या लोकांना भिववावे, ज्याच्यात आपल्या पूर्वी कोणी भिवविणारा आला नाही. म्हणून एका मुदतीपासून हे लोक, सत्य धर्माकडून गाफील आहे. हा विषय पहिले पण कित्येक ठिकाणी येऊन चुकला आहे की, अरबांमध्ये ह.इस्माईल عليه السلام नंतर, नबी ﷺ च्या पूर्वी, खऱ्याअर्थाने कोणी पैगंबर आला नाही. येथे पण याच गोष्टीला सांगितले गेले आहे.

४) जसे अबुजहल, उतबा शैबा वगैरे. गोष्ट सिद्ध होण्याचा अर्थ, अल्लाहतआलाचा हा फर्मान आहे की, ''मी नरकाग्नीला, जिन्न आणि मनुष्यांनी भरून टाकीन.'' (सू.अलीफ-लाम-मीम-सजद:-१३) शैतानाला संबोधित करून, अल्लाहतआलाने फर्माविले, ''मी जहन्नमला तुझ्याने, आणि तुझ्या अनुकरण करणाऱ्यांनी, भरून टाकीन.'' (सू.सॉद-८५) म्हणजे त्या लोकांनी शैतानाच्या मागे लागून, आपल्या स्वत:ला नरकाग्नीला पात्र ठरवून घेतले कारण की, अल्लाहने तर त्यांना अधिकार आणि विचार स्वातंत्र्य, बहाल केले होते. परंतु यांनी याचा उपयोग चुकीने केला. आणि अशा प्रकारे नरकाग्नीचे इंधन बनून गेलेत. असे नाही की, अल्लाहने बळजबरीने त्यांना ईमानापासून वंचित् ठेवले; कारण की, सक्तीच्या स्वरूपांत तर ते शिक्षेला पात्रच ठरविले गेले नसते.

५) ज्याच्यामुळे ते इकडे तिकडे पाहूंशकत नाहीत. तसेच डोके वाकवूंशकत नाहीत. किंबहुना ते डोके वर उचललेले आणि नजरा खाली केलेले आहेत. हा त्यांचा सत्त्याला कबूल न करण्याचा, आणि अल्लाहच्या मार्गांत खर्च न करण्याचा, परिणाम आहे. हे पण शक्य आहे की, हे त्यांच्या नरकाग्नीच्या शिक्षेच्या अहवालाचे वर्णन असावे. (अयसरूत तफासीर)
६) म्हणजे ऐहिक आयुष्य यांच्यासाठी सुशोभित करून देण्यांत आले. ही जणू यांच्या समोर एक आड आहे. जिच्यामुळे ते या जगाच्या लज्जतीशिवाय काही पाहत नाही. आणि हीच गोष्ट त्यांच्या आणि ईमानाच्या दर्म्यान रुकावट आणि पर्दा आहे. आणि परलोकाची कल्पना त्यांच्या बुद्धीत अशक्य (न घडून येणारी घटना) असे करून देण्यात आले आहे. ही जणू त्यांच्या मागची आड आहे. ज्यामुळे ते तौबा करीत नाही. आणि उपदेशपण ग्रहण करीत नाही; कारण की, परलोकाचे काही भयच, त्यांच्या मनांत नाही.
७) किंवा त्यांच्या डोळ्यांना झांकून दिले. म्हणजे पैगंबराशी शत्रुत्व, आणि त्याच्या सत्त्याच्या आवाहनाच्या तिरस्काराने, त्यांच्या डोळ्यांवर पट्टी बांधून दिली. किंवा त्यांना आंधळे करून टाकले आहे, ज्यामुळे ते पाहूंशकत नाहीत. हे त्यांच्या अवस्थेची दुसरी उपमा आहे.
८) म्हणजे जे आपल्या कर्तृत्वामुळे बहकण्याच्या त्या ठिकाणी पोहचूंन जावेत. त्यांच्या करतां उपदेश फायदेकारक नसतो.
९) म्हणजे कयामतच्या दिवशी; येथे मृतांना जिवंत करण्याचा उल्लेख करून, हा इशारा करण्याचा पण उद्देश्य आहे की, अल्लाहतआला काफिरांमधून, ज्याचे मन इच्छितो जिवंत करून देतो. जे कुफ्र आणि अज्ञानामुळे मृत होऊन गेलेले असतात. मग ते हिदायत आणि ईमानाचा अंगीकार करून घेतात.
१०) 'मा कद्दमु' ने ती कर्मे अभिप्रेत आहेत, जी मनुष्य स्वत: आपल्या जीवनांत करतो व 'आसारहुम' ने ती कर्मे ज्यांचे कार्मिक नमुने (चांगले किंवा वाईट) तो जगांत सोडून जातो; आणि त्याच्या मृत्युनंतर त्याच्या अनुकरणामध्ये लोक ती कर्मे पार पाडतात. ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे, ''ज्याने इस्लाममध्ये कोणी चांगली पद्धत चालू केली, त्याच्यासाठी त्याचे पुण्याचा बदला पण आहे. आणि त्याच्यास्वन:चापण आहे, जो त्याच्यानंतर त्याच्यावर अंमल करेल, याशिवाय की, त्यांच्यातून कोणाच्या मोबदल्यात कमी व्हावी. आणि ज्याने कोणी वाईट पद्धत जारी केली, यावर त्याच्या आपल्या गुन्ह्यांचे पण ओझे असेल, आणि त्याचा पण, जो त्याच्यानंतर यावर कर्मे करील, याशिवाय की, यांच्यातून कोणाच्या ओझ्यांत कमी व्हावी'' (स.मुस्लिम) अशा प्रकारे हदीसमध्ये आहे, ''जेव्हा मनुष्य मरून जातो, तर त्याच्या कर्मांचा क्रम संपून जातो. तीन गोष्टींशिवाय (१) ज्ञान ज्याच्याने लोक फायदा उचलतील (२) सदाचरणी संतती, जी मरणाऱ्यासाठी दुआ करेल (३) किंवा सदका जारीया, ज्याच्याने त्याच्या मृत्युनंतर लोक लाभान्वयीत होतील. (स.मुस्लिम) दुसरा अर्थ 'आसारहुम' चा 'पाऊलखुणा' आहेत. म्हणजे मनुष्य पुण्य किंवा पापासाठी जो प्रवास करतो, आणि एका जागेवरून दुसऱ्या जागी जातो, तर पावलांच्या या खुणा, पण लिहल्या जातात. जसे पैगंबरी काळांत, मसजिदे नबवी जवळ काही जागा खाली होती; तर बनु सलमाने तिकडे वसण्याचा इरादा केला. जेव्हा नबी ﷺ ला ही गोष्ट माहीत झाली, तेव्हा आपण ﷺ त्यांना मशीदिजवळ स्थलांतर करण्याला मना केले आणि फर्माविले (दोन वेळा फर्माविले, ''तुमची घरे जरी दूर आहेत, परंतु तेथेच रहा. जेवढी पावले तुम्ही चालून येता, ती लिहली जातात'' (स.मुस्लीम) इमाम इब्ने कसीर म्हणतात, दोन्ही भावार्थ आपल्या जागी बरोबर आहेत. यांच्या दर्म्यान एक दुसऱ्याचे खंडन नाही. किंबहुना या दुसऱ्या भावार्थांत सक्त तंबी आहे; यासाठी की जेव्हां पावलांच्या खुणा पण लिहल्या जातात, तर मनुष्य जो चांगला आणि वाईट नमुना सोडून जाईल, ज्याचे नंतर लोक अनुकरण करतील, तर ते तर चांगल्या रीत्या लिहले जातील.
११) याच्याने अभिप्रेत लौहे महफूज आहे. आणि काहींनी कर्मपत्रे अभिप्रेत धरली आहे.
१२) कारण की, मक्कावाल्यांनी हे समजून घ्यावे की, आपण ﷺ कोणी अनोळखी पैगंबर नाही. किंबहुना पैगंबरीचा हा क्रम पुरातनकाळापासून चालत आला आहे. त्यांनी देखील शेवटचे पैगंबर ह.मोहम्मद ﷺ प्रमाणे आपल्या समूहाला एकेश्वरवादाचा पाठ दिला, कयामतपासून भिवविले आणि ईमानवाल्यांना स्वर्ग आणि त्याच्या देणग्यांची खुषखबर दिली. किंवा याचा अर्थ नबी करीम ﷺ चे सांत्वन केले आहे की, आपण काही पहिले पैगंबर नाहीत. आपल्या पूर्वीदेखील काही पैगंबर आलेत. तथापि काही ठिकाणी एकाच वेळी कित्येक पैगंबर आले. (जसे अंताकीयामध्ये तीन पैगंबर आलेत.) परंतु त्यांच्या समूहाने त्यांच्यावर ईमान आणले नाही. तथापि त्यांना त्रास दिला, ज्यावर त्यांनी संयम राखला. म्हणून जर आपला समूह (कौम) आपल्याबरोबर आपल्याकडे लक्ष देत नाहीत, तर हा इतिहासाचा क्रम आहे ज्यास प्रत्येक पैगंबरांबरोबर पुनरावृत्ती केली गेली आहे. यात घाबरण्याचे, त्रस्त होण्याचे काहीच कारण नाही.

إِذْ أَرْسَلْنَآ إِلَيْهِمُ اثْنَيْنِ فَكَذَّبُوهُمَا فَعَزَّزْنَا بِثَالِثٍ
فَقَالُوٓا إِنَّآ إِلَيْكُم مُّرْسَلُونَ ﴿١٤﴾

म्हणजे जेव्हा की आम्ही त्यांच्याजवळ दोघांना पाठविले; तर प्रथम त्या लोकांना खोटे ठरवले मग आम्ही (त्यांचे) तिसऱ्याने समर्थन केले. तेव्हा, त्या तिघांना म्हटले, आम्ही तुमच्याजवळ पाठविण्यांत आलेलो आहोत[१] (१४)

قَالُوا مَآ أَنتُمْ إِلَّا بَشَرٌ مِّثْلُنَا وَمَآ أَنزَلَ الرَّحْمَٰنُ مِن
شَيْءٍ إِنْ أَنتُمْ إِلَّا تَكْذِبُونَ ﴿١٥﴾

त्या लोकांनी सांगितले की, तुम्हीतर आमच्याच सारखी सामान्य माणसे [२] आहात. आणि परम दयाळू (अल्लाह) ने कुठलीही वस्तू अवतरीत केली नाही. [३] तुम्ही निव्वळ खोटे बोलत आहात[४] (१५)

قَالُوا رَبُّنَا يَعْلَمُ إِنَّآ إِلَيْكُمْ لَمُرْسَلُونَ ﴿١٦﴾

या पैगंबरांनी सांगितले, आमचा पालनकर्ता जाणतो की, नि:संशय आम्ही तुमच्याजवळ पाठविलेले आहोत (१६)

وَمَا عَلَيْنَآ إِلَّا الْبَلَٰغُ الْمُبِينُ ﴿١٧﴾

आणि आमच्यावर तर फक्त, स्पष्टपणे पोहचवून देणे आहे. (१७)

قَالُوٓا إِنَّا تَطَيَّرْنَا بِكُمْ لَئِن لَّمْ تَنتَهُوا لَنَرْجُمَنَّكُمْ وَ
لَيَمَسَّنَّكُم مِّنَّا عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١٨﴾

ते म्हणाले की आम्ही तर तुम्हांस अपशकुनी समजतो; [५] जर तुम्ही यापासून माघार घेतली नाही, तर आम्ही तुम्हास धोंडमार करून टाकू; आणि तुम्हास आमच्याकडून कडक शिक्षा मिळेल. (१८)

قَالُوا طَٰٓئِرُكُم مَّعَكُمْ أَئِن ذُكِّرْتُم بَلْ أَنتُمْ قَوْمٌ
مُّسْرِفُونَ ﴿١٩﴾

या पैगंबरांनी सांगितले की, तुमचा अपशकून तर तुमच्याच बरोबर लागलेला आहे. [६] काय याला अपशकून समजतात की, तुम्हास उपदेश केला जावा, किंबहुना तुम्ही मर्यादेच्या बाहेर निघून जाणारे लोक आहात (१९)

وَجَآءَ مِنْ أَقْصَا الْمَدِينَةِ رَجُلٌ يَسْعَىٰ قَالَ يَٰقَوْمِ اتَّبِعُوا
الْمُرْسَلِينَ ﴿٢٠﴾

आणि एक मनुष्य त्या शहराच्या शेवटच्या भागाकडून पळत पळत आला, आणि सांगू लागला की, हे माझ्या लोकांनो! या पैगंबरांच्या मार्गावर चाला. [७] (२०)

اتَّبِعُوا مَن لَّا يَسْـَٔلُكُمْ أَجْرًا وَهُم مُّهْتَدُونَ ﴿٢١﴾

अशा लोकांच्या मार्गावर चाला, जे तुमच्याजवळ काही वेतन मागत नाही; आणि ते सरळ मार्गावर आहेत (२१)

१) हे तीन पैगंबर कोण होते? भाष्यकारांनी त्यांची वेगवेगळी नांवे सांगितली आहेत. परंतु नांवे योग्य सनदीने सिद्ध नाहीत. काही भाष्यकारांचा विचार आहे की, हे ह.ईसा عليه السلام चे पाठविलेले होते; जे त्यांनी अल्लाहच्या हुकूमाने एका वस्तीत, प्रचार आणि प्रसारासाठी पाठविले होते. वस्तीचे नांव अंताकीया होते.

२) म्हणजे त्यांचे पण असे मागणे होते की, रसूल आणि नबी मनुष्यांमधून नाही, कोण्या अन्य कोणी सृष्टीतून असले पाहिजे. मनुष्यातूनच कोण्या एका माणसाचे नबी बनून जाणे काही गोष्ट नाही, न यामुळे दुसऱ्यांवर काही महात्म्य किंवा मरातब (श्रेष्ठत्व).

३) यामध्ये आकाशी ग्रंथाच्या अवतरीत होण्याचा पूर्णपणे नकार आहे की, अल्लाहतआलाने क्रमाने कोणी पुस्तकच अवतरीत केले नाही.

४) त्यांचा खोडसाळपणा इतका वाढला की, त्यांना खोटे देखील ठरवून टाकले.

५) शक्य आहे काही लोकांनी ईमान आणले असावे, आणि त्यांच्यामुळे समाज दोन गटांत विभागला गेला असावा. ज्याला त्यांनी पैगंबरांचा (नाऊजुबिल्लाह) अपशकून ठरविला किंवा पाऊस पडणे बंद झाले असावे. तर त्यांनी असे समजले की, हा पैगंबरांचा अपशकून असावा. नाऊजुबिल्लाह् मिन् जालिक. जसे आजकाल पण, धर्म आणि धर्मशास्त्राकडून अज्ञानांत असलेले लोक, ईमान आणि ईशभयवाल्यांनाच अपशकुनी समजतात.

६) म्हणजे हा तुमच्या कुकर्मांचा परिणाम आहे. जो तुमच्याबरोबरच आहे, न की आमच्या बरोबर.

७) हा मनुष्य मुसलमान होता; जेव्हां त्याला ठाऊक झाले की, लोक पैगंरबरांच्या आवाहनाला, अंगीकारत नाही, तर त्याने येऊन पैगंबरांचा पुरस्कार आणि त्यांच्या आज्ञापालनाचे आवाहन केले.

وَمَالِيَ لَآ أَعۡبُدُ ٱلَّذِي فَطَرَنِي وَإِلَيۡهِ تُرۡجَعُونَ ﴿٢٢﴾

**आणि मला काय झाले आहे की, मी त्याची उपासना करू नये, ज्याने मला निर्माण केले. आणि तुम्ही सर्व त्याच्याच कडे परतून जाणार आहात[१] (२२)**

ءَأَتَّخِذُ مِن دُونِهِۦٓ ءَالِهَةً إِن يُرِدۡنِ ٱلرَّحۡمَٰنُ بِضُرّٖ لَّا تُغۡنِ عَنِّي شَفَٰعَتُهُمۡ شَيۡـٔٗا وَلَا يُنقِذُونِ ﴿٢٣﴾

**काय मी त्याला सोडून, अशांना उपास्य बनवावे की, जर परम दयाळू (अल्लाह) मला काही नुकसान पोहचवू इच्छील, तर त्यांची शिफारस मला काही नफा पोहचवू शकणार नाही; आणि न ते मला वाचवू शकतील.[२] (२३)**

إِنِّيٓ إِذٗا لَّفِي ضَلَٰلٖ مُّبِينٍ ﴿٢٤﴾

**मग तर मी स्पष्ट बहकलेला असेल.[३] (२४)**

إِنِّيٓ ءَامَنتُ بِرَبِّكُمۡ فَٱسۡمَعُونِ ﴿٢٥﴾

**माझे ऐका! मी तर (खऱ्या मनाने) तुम्हा सर्वांच्या पालनकर्त्यावर ईमान आणून चुकलो[४] (२५)**

قِيلَ ٱدۡخُلِ ٱلۡجَنَّةَۖ قَالَ يَٰلَيۡتَ قَوۡمِي يَعۡلَمُونَ ﴿٢٦﴾

**(त्याला) सांगण्यात आले कीं, स्वर्गात चालला जा! म्हणू लागला जर माझ्या लोकांना पण याचे ज्ञान झाले असते (२६)**

بِمَا غَفَرَ لِي رَبِّي وَجَعَلَنِي مِنَ ٱلۡمُكۡرَمِينَ ﴿٢٧﴾

**की, मला माझ्या पालनकर्त्याने क्षमा करून टाकले, आणि आदर सन्मान केलेल्या लोकांत करून दिले.[५] (२७)**

१) आपल्या एकेश्वरवादाचा (तौहीद) खुलासा केला; ज्याचा उद्देश आपल्या लोकांचे भले इच्छिणे, आणि त्यांचे बरोबर मार्गदर्शन करणे आहे. हे पण शक्य आहे की, त्यांच्या लोकांनी त्याला सांगितले असेल, काय तू पण त्या उपास्याची उपासना करतोस, ज्याच्याकडे हे पैगंबर आम्हास बोलावित आहे; आणि आमच्या उपास्यांना तू पण सोडून बसला आहेस? ज्याच्या उत्तरात त्याने हे सांगितले. भाष्यकारांनी या माणसाचे नांव हबीब नज्जार, सांगितले आहे. वल्लाहु अअ्लम्!

२) हा त्या खोट्या उपास्यांच्या असहाय्यतेचा खुलासा आहे; ज्यांची उपासना त्याचे लोक करीत असत. आणि शिर्कच्या या अज्ञानांतून त्यांना काढण्यासाठी, पैगंबर त्यांच्याकडे पाठविण्यात आले होते. वाचवू शकले नाहीचा अर्थ आहे, की अल्लाह् जर मला काही नुकसान पोहचवू इच्छील, तर हे मला वाचवू शकत नाही.

३) म्हणजे जर मी पण तुमच्याप्रमाणे, अल्लाहूला सोडून अशा लाचार आणि कुठलाही अधिकार नसलेल्या, उपास्यांची उपासना सुरु करुन देईन, तर मी सुध्दा खुल्या बहकण्यात येऊन जाईल. किंवा 'जलाल' येथे नुकसानी च्या अर्थात आहे. म्हणजे हा तर, फारच खुल्या तोट्याचा व्यापार आहे.

४) त्याच्या एकेश्वरवादाच्या आवाहनाला, आणि एकेश्वरवादाच्या मान्यतेच्या उत्तरात, लोकांनी त्याला ठार करू इच्छीले, तेव्हा त्याने पैगंबरांना संबोधित करून हे सांगितले; उद्देश्य आपल्या ईमानावर त्यांना, म्हणजे पैगंबराना साक्षीदार बनवणे होते. किंवा आपल्या लोकांना उद्देशून सांगितले, ज्याचा उद्देश्य, सत्य धर्मावर आपले ठामपणे उभे रहाणे, आणि दृढ राहण्याचे जाहीर करणे होते; कीं, तुम्हास जे काही करावयाचे ते करून टाका. परंतु नीट ऐकून घ्या! माझे ईमान त्याच पालनकर्त्यावर आहे, जो तुमचा पण पालनकर्ता आहे. असे म्हणतात की, त्यांनी त्याला मारून टाकले. आणि कोणी त्यांना यापासून मना केले नाही. (त्यावर अल्लाहची कृपा असो)

५) म्हणजे ज्या ईमान आणि एकेश्वर वादामुळे मला माझ्या पालनकर्त्याने क्षमा करून टाकले माझा समाज या गोष्टीला जाणून घेईल! कारण की त्यांनी सुध्दा, ईमान आणि एकेश्वरवादाचा अंगिकार करून अल्लाहच्या क्षमा आणि त्याच्या देणग्यांचे हक्कदार बनून जावे. अशाप्रकारे त्या मनुष्याने,मेल्यावर सुध्दा आपल्या लोकांचे भले इच्छीले. एका खऱ्या ईमानवाल्याला असेच असावयास पाहिजे कीं, त्याने नेहमी, लोकांचे भलेच इच्छावे. वाईट चिंतू नये. त्यांना बरोबर मार्गदर्शन करावे; आडमार्गाला भटकवू नये. नि:संशय, लोकांनी त्याला जे इच्छावे ते सांगावे; आणि ज्याप्रमाणे इच्छावे, त्याच्याशी वर्तन करावे; येथ पावेतो की, त्याला मारून टाकावे.

| | |
|---|---|
| याच्यानंतर आम्ही त्याच्या लोकावर आकाशातून कोणी लष्कर उतारले नाही[१] आणि न आम्ही अशा प्रकारे (लष्कर) उतारत असतो.[२] ㉘ | وَمَآ اَنۡزَلۡنَا عَلٰى قَوۡمِهٖ مِنۡۢ بَعۡدِهٖ مِنۡ جُنۡدٍ مِّنَ السَّمَآءِ وَمَا كُنَّا مُنۡزِلِيۡنَ ۝٢٨ |
| ती तर फक्त एक भयंकर गर्जना होती. की अचानक ते सर्वच्या सर्व विझून गेले.[३] ㉙ | اِنۡ كَانَتۡ اِلَّا صَيۡحَةً وَّاحِدَةً فَاِذَا هُمۡ خٰمِدُوۡنَ ۝٢٩ |
| (अशा) लोकांवर खेद[४] आहे! जेव्हापण कोणी पैगंबर, त्यांच्याजवळ आला, तेव्हा त्यांनी त्याची हंशीन उडविली असेल; ㉚ | يٰحَسۡرَةً عَلَى الۡعِبَادِ ؕ مَا يَاۡتِيۡهِمۡ مِّنۡ رَّسُوۡلٍ اِلَّا كَانُوۡا بِهٖ يَسۡتَهۡزِءُوۡنَ ۝٣٠ |
| काय त्यांनी पाहिले नाही की, यांच्यापूर्वी पुष्कळशा वस्त्या आम्ही गारद करून टाकल्या कीं, त्यांचे[५] रहाणारे परत फिरून येत नाही ㉛ | اَلَمۡ يَرَوۡا كَمۡ اَهۡلَكۡنَا قَبۡلَهُمۡ مِّنَ الۡقُرُوۡنِ اَنَّهُمۡ اِلَيۡهِمۡ لَا يَرۡجِعُوۡنَ ۝٣١ |
| असा कोठलाही लोकसमूह नाही, जो गोळा करून आमच्या समोर हजर केला जाणार नाही.[६] ㉜ | وَاِنۡ كُلٌّ لَّمَّا جَمِيۡعٌ لَّدَيۡنَا مُحۡضَرُوۡنَ ۝٣٢ |
| आणि त्यांच्या साठी एक[७] निशाणी, कोरडी मृत जमीन आहे; जिला आम्ही जिवंत करून टाकतो; आणि तिच्यांतून धान्य उगवितो, ज्यांच्यातून हे खातात ㉝ | وَاٰيَةٌ لَّهُمُ الۡاَرۡضُ الۡمَيۡتَةُ ۖۚ اَحۡيَيۡنٰهَا وَاَخۡرَجۡنَا مِنۡهَا حَبًّا فَمِنۡهُ يَاۡكُلُوۡنَ ۝٣٣ |
| आणि आम्ही इच्यातून खजुरीचे आणि द्राक्षांचे बाग निर्माण करून दिले आहेत;[८] आणि ज्याच्यांत आम्ही झरे वाहवून दिले आहेत. ㉞ | وَجَعَلۡنَا فِيۡهَا جَنّٰتٍ مِّنۡ نَّخِيۡلٍ وَّاَعۡنَابٍ وَّفَجَّرۡنَا فِيۡهَا مِنَ الۡعُيُوۡنِ ۝٣٤ |
| कारण की, लोकांनी याची फळे खावीत;[९] आणि त्यांनी आपल्या हातांनी त्यांना बनविले नाही,[१०] मग कां म्हणून ते आभार मानत नाहींत? ㉟ | لِيَاۡكُلُوۡا مِنۡ ثَمَرِهٖ ۙ وَمَا عَمِلَتۡهُ اَيۡدِيۡهِمۡ ؕ اَفَلَا يَشۡكُرُوۡنَ ۝٣٥ |
| तो परम पवित्र आहे, ज्याने प्रत्येक वस्तुंच्या जोड्या निर्माण केल्यात; मग जरी त्या जमिनीने उगविलेल्या वस्तूअसोत किंवा स्वत: यांच्या जातीतून असोत; किंवा त्या (वस्तू) आहेत, ज्यांना हे लोक जाणत देखील नाही.[११] ㊱ | سُبۡحٰنَ الَّذِىۡ خَلَقَ الۡاَزۡوَاجَ كُلَّهَا مِمَّا تُنۡۢبِتُ الۡاَرۡضُ وَمِنۡ اَنۡفُسِهِمۡ وَمِمَّا لَا يَعۡلَمُوۡنَ ۝٣٦ |
| आणि यांच्यासाठी एक निशाणी रात्र आहे, जिच्यांतून आम्ही दिवसाला वेगळे करून देतो, तर ते अचानक अंधारात राहून जातात.[१२] ㊲ | وَاٰيَةٌ لَّهُمُ الَّيۡلُ ۖۚ نَسۡلَخُ مِنۡهُ النَّهَارَ فَاِذَا هُمۡ مُّظۡلِمُوۡنَ ۝٣٧ |
| आणि सूर्यासाठी जो निश्चित केलेला मार्ग आहे, तो त्याच्यावरच चालत राहतो.[१३] ही जबरदस्त आणि सर्वज्ञानी अल्लाहची मांडणी आहे. ㊳ | وَالشَّمۡسُ تَجۡرِىۡ لِمُسۡتَقَرٍّ لَّهَا ؕ ذٰلِكَ تَقۡدِيۡرُ الۡعَزِيۡزِ الۡعَلِيۡمِ ۝٣٨ |

१) म्हणजे हबीब नज्जारला ठार केल्यानंतर, आम्ही त्यांना गारद करण्यासाठीं देवदूतांने कोणी लष्कर, आकाशांतून उतारले नाहीं. हा त्या लोकांचा क्षुल्लक लेखण्याकडे इशारा आहे.

२) म्हणजे ज्या लोकांचे गारद करणे कोण्या दुसऱ्या प्रकारे लिहलेले असते, तर तेथे आम्ही देवदूत अवतीर्ण सुध्दा करीत नाही.

३) असे म्हणतात कीं, जिब्रईल عليه السلام नी एक आरोळी ठोकली, जिच्यामुळे सर्वांच्या शरीरांतून प्राण निघून गेले; आणि ते विझलेल्या आगी सारखे होऊन गेले. जणू जीवन हे धगधगत्या अग्नीसारखे आहे, आणि मृत्यू, तिचे विझून राखीचा ढीग होऊन जाणे आहे.

४) खेद आणि पश्चात्तापाचे हे प्रदर्शन स्वत: आपल्या जीवावर, कयामतच्या दिवशी, शिक्षा पाहून घेतल्यानंतर, करतील की, अरेरे! त्यांनी अल्लाहच्या बाबतीत कोताई केली नसती; किंवा अल्लाहतआला त्या लोकांच्या

वर्तणुकीवर खेद करीत आहे; की यांच्याजवळ जेव्हापण कोणी पैगंबर आला, त्यांनी त्याची टिंगलच केली.

५) यांच्यात मक्केवाल्यांकरीता तंबी आहे. की पैगंबरीला खोटे ठरविल्यामुळे ज्याप्रमाणे मागील समाज, उध्वस्त झालेत, हे पण उध्वस्त होऊ शकतात.

६) यांच्यात 'इन्' 'नाफिया' आहे. आणि 'लम्मा', 'इल्लाच्या' अर्थांत आहे अर्थ आहे कीं, सर्वलोक मागील सुध्दाआणि भविष्यांत येणारे सुध्दा सर्व अल्लाह्समक्ष हजर केले जातील; जेथे त्यांचा लेखा जोखा होईल.

७) म्हणजे अल्लाह्तआलाचे अस्तित्व, त्याचे संपूर्ण सामर्थ्य, आणि मृतांना दुसऱ्यादा जिवंत करण्यावर निशाणी.

८) म्हणजे मृत जमिनीला जिवंत करून, आम्ही त्यांच्या खाण्याकरीता नुसते धान्यच उगवीत नाही; किंबहुना त्यांच्या जिभेच्या स्वादा करिता विविध प्रकारची फळे सुध्दा भरपूर निर्माण करितो. येथे फक्त दोन फळांचा उल्लेख, यासाठी केला आहे कीं, हे भरपूर नफा देणारी सुध्दाआहेत, आणि अरबांना प्रिय सुध्दा. तसेच यांची उपज पण अरबमध्यें जास्त आहे. मग धान्याचा उल्लेख प्रथम केला, कारण कीं यांची पैदास पण जास्त आहे. आणि खाद्याचे दृष्टीने पण त्यांचे महत्त्व अनन्य साधारण आहे. जो पर्यंत मनुष्य भाकर आणि भात वगैरे खाद्याने आपले पोट भरीत नाही, निव्वळ फळफळादीने त्याच्या खाद्याची गरज पूर्ण होत नाही.

९) म्हणजे काही ठिकाणी झरे पण वाहवून काढतो; ज्यांच्या पाण्याने निर्माण होणारी फळे लोकांनी खावी.

१०) इमाम इब्ने जरीरच्या जवळ, येथे 'मा नाफिया' आहेत म्हणजे धान्य आणि फळांचे हे उत्पन्न, अल्लाह्तआलाची खास मेहेरबानी आहे, जी तो आपल्या सेवकांवर करतो. यांच्यात त्यांचे प्रयत्न आणि कष्ट, प्रयत्नांची पराकाष्टा, आणि हस्तक्षेप, यांचा काही वाटा नाही. तरी सुध्दा हे अल्लाह्च्या या देणग्यावर त्याची उपकार स्तुती का करीत नाही? आणि काही जवळ 'मा मवसुला' आहे, जे अल्लजींच्या अर्थांत आहे. म्हणजे त्यांनी याची फळे खावीत आणि ते ज्यांना यांनी आपल्या हाताने बनविली, हातांचे कर्म आहे, जमिनीला सपाट करून, बी पेरणे अशाच प्रमाणे फळांना खाण्याचे निरनिराळ्या पध्दती आहेत. उदाहरणार्थ त्यांना पिळून त्यांचा रस पिणे, वेगवेगळ्या फळांचे मिश्रण करून त्यांचा पाक करणे वगैरे.

११) म्हणजे माणसांप्रमाणे, जमिनीचे प्रत्येक उत्पादनात सुध्दा, आम्ही नर व मादी, दोन्ही निर्माण केले आहेत. या शिवाय आकाश आणि पृथ्वीच्या खोलीत सुध्दा, ज्या वस्तू तुमच्यापासून अदृष्य आहे, ज्यांचे ज्ञान तुमच्या जवळ नाही, त्यांच्यात सुध्दा, नर मादीची ही व्यवस्था आम्ही ठेवली आहे. तर संपूर्ण सृष्टी जोडी जोडी आहे. वनस्पतीमध्ये सुध्दा नर मादीची हीच व्यवस्था आहे. येथपावेतो की परलोकाचे जीवन, ऐहिक जीवनासाठी, जणू जोडी सारखेच आहे. आणि पारलौकिक जीवनासाठी एक बुध्दी प्रामाण्यपण आहे. फक्त अल्लाह्चे एक व्यक्तित्व आहे, जे सृष्टीच्या या वैशिष्टयापासून, आणि दुसऱ्या कोताईपासून पवित्र आहे. तो विषम आहे, (म्हणजे एक) सम नाही. (म्हणजे तो एकटा आहे, त्याचा कोणी जोडीदार नाही.)

१२) म्हणजे अल्लाह्च्या सामर्थ्यांचे एक प्रमाण हे पण आहे कीं, तो दिवसाला रात्रीपासून वेगळे करून देतो. ज्यामुळे लगेच अंध:कार पसरून जातो. 'सलखा' चा अर्थ आहे जनावराच्या चामडीला त्याच्या शरीरापासून वेगळे करणे, ज्यामुळे त्यांचे पांढरे मांस दिसू लागते. अशाच प्रकारे अल्लाह् दिवसाला रात्री पासून वेगळे करून टाकतो. 'अज्लम'चा अर्थ आहे, अंधारामध्ये दाखल होऊन जाणे. जसे 'असबह' व 'अमसा' आणि 'अजहर' चा अर्थ आहे. सकाळ, संध्याकाळ, आणि दुपारमध्ये दाखल होणे.

१३) म्हणजे आपल्या त्या कक्षेमध्ये चालत राहतो, जी अल्लाह्ने त्याच्या साठी निश्चित करून दिली आहे. याच्यानेच आपल्या प्रवासाचा आरंभ करतो. आणि त्याच्यावरच संपवितो. याच्याशिवााय इच्यावरून जरा इकडे तिकडे होत नाही. कीं, कोण्या दुसऱ्या ताऱ्याशी टक्कर होऊन जावी. दुसरा अर्थ आहे, ''आपल्या थांबण्याच्या जागेपर्यंत'' आणि याची ही थांबण्याची जागा 'अर्ष' च्या खाली आहे. जसे की, हदीस मध्ये आहे, सूर्य दररोज अस्तानंतर, अर्षाच्या खाली जाऊन सजदा करतो. आणि मग तेथून उदय होण्याची परवानगी मागतो. (स.बुखारी, सू.यासिन) दोन्ही भावार्थाच्या अनुषंगाने 'लिमुस्तकर्रीन' मध्ये 'लाम' सबबी साठी आहे. काही म्हणतात की, 'लाम' 'इला'च्या अर्थात आहे, मग 'मुस्तकर्र', कयामतचा दिवस होईल म्हणजे सूर्याचे हे चालणे कयामतच्या दिवसापर्यंत आहे. कयामतच्या दिवशी त्याची हाल चाल संपून जाईल. हे तिन्ही भावार्थ आपआपल्या जागी बरोबर आहेत.

| | |
|---|---|
| आणि चंद्राच्या आम्ही कला ठरविल्या आहेत. [१] येथपावेतो की, तो परतून जुन्या फांदी सारखा होऊन जातो. [२] ३९ | وَالْقَمَرَ قَدَّرْنٰهُ مَنَازِلَ حَتّٰى عَادَ كَالْعُرْجُوْنِ الْقَدِيْمِ ﴿٣٩﴾ |
| न सूर्याची ही हिंमत आहे की, त्याने चंद्राला जाऊन गाठावे; [३] आणि न रात्र, दिवसाच्या पुढे जाणारी आहे; [४] आणि सर्वच्यासर्व आकाशात पोहत फिरत आहेत. [५] ४० | لَا الشَّمْسُ يَنْۢبَغِيْ لَهَآ اَنْ تُدْرِكَ الْقَمَرَ وَلَا الَّيْلُ سَابِقُ النَّهَارِ ۗ وَكُلٌّ فِيْ فَلَكٍ يَّسْبَحُوْنَ ﴿٤٠﴾ |
| आणि यांच्यासाठी एक निशाणी ही पण आहे की, आम्ही यांच्या संततीला, भरलेल्या गलबतात स्वार करून दिले. [६] ४१ | وَاٰيَةٌ لَّهُمْ اَنَّا حَمَلْنَا ذُرِّيَّتَهُمْ فِي الْفُلْكِ الْمَشْحُوْنِ ﴿٤١﴾ |
| आणि यांच्याकरिता याच्या सारख्या आणखी वस्तु निर्माण केल्यात, ज्यावर हे स्वार होतात. [७] ४२ | وَخَلَقْنَا لَهُمْ مِّنْ مِّثْلِهٖ مَا يَرْكَبُوْنَ ﴿٤٢﴾ |
| आणि जर आम्ही इच्छितो तर त्यांना बुडवून टाकतो; मग न कोणी त्यांची फिर्याद ऐकणारा, न ते त्यांतून सोडविले जाते. ४३ | وَاِنْ نَّشَاْ نُغْرِقْهُمْ فَلَا صَرِيْخَ لَهُمْ وَلَا هُمْ يُنْقَذُوْنَ ﴿٤٣﴾ |
| परंतु, आम्ही आपल्याकडून, त्यांच्यावर मेहेरबानी करतो; आणि एका मुदतीपर्यंत त्यांना फायदा पोहचवित आहोत. ४४ | اِلَّا رَحْمَةً مِّنَّا وَمَتَاعًا اِلٰى حِيْنٍ ﴿٤٤﴾ |
| आणि जेव्हा कधी त्यांना सांगण्यात येते की, पुढच्या आणि मागच्या गुन्ह्यांपासून वांचा, यासाठी की, तुमच्यावर दया केली जावी. ४५ | وَاِذَا قِيْلَ لَهُمُ اتَّقُوْا مَا بَيْنَ اَيْدِيْكُمْ وَمَا خَلْفَكُمْ لَعَلَّكُمْ تُرْحَمُوْنَ ﴿٤٥﴾ |
| आणि यांच्याजवळ तर, त्यांच्या पालनकर्त्यांच्या निशाणीमधून कोणी निशाणी अशी येत नाही की जीच्या पासून हे तोंड फिरवीत नाहीत. [८] ४६ | وَمَا تَاْتِيْهِمْ مِّنْ اٰيَةٍ مِّنْ اٰيٰتِ رَبِّهِمْ اِلَّا كَانُوْا عَنْهَا مُعْرِضِيْنَ ﴿٤٦﴾ |

१) चंद्राच्या २८ कला आहेत दररोज एक कला पार करतो. मग दोन रात्री अदृष्य राहून, तिसऱ्या रात्री उदय पावतो.

२) म्हणजे जेव्हा शेवटच्या कलेवर पोहचतो, तर बिलकुल बारिक आणि लहान होऊन जातो. जशी खजुरीच्या झाडाची जुनी फांदी असावी. जी वाळून वाकडी होऊन जाते. चंद्राच्या चालींमुळे, पृथ्वीवर रहाणारे आपल्या दिवस, महीने आणि वर्षांचा हिशेब आणि आपल्या उपासनेच्या वेळांची निश्चिती करतात.

३) म्हणजे सूर्यासाठी हे शक्य नाही की, त्याने चंद्राला जाऊन गाठावे; ज्यामुळे त्याचा प्रकाश संपून जावा. परंतु दोघांचा आपला आपला मार्ग आणि वेगवेगळ्या हद्दी आहेत. सूर्य दिवसाच, आणि चंद्र रात्रीच, उदय पावतात याच्या उलट कधी झाले नाही; जे एका विश्वाच्या व्यवस्थापकाच्या अस्तित्वावर एक फार मोठे प्रमाण आहे.

४) किंबहुना एक व्यवस्थेच्या अंतर्गत बांधलेले आहेत, आणि एक दुसऱ्याच्यानंतर येतात.

५) 'कुल्लुन' ने सूर्य चंद्र, किंवा यांच्या बरोबर दुसरी नक्षत्रे, अभिप्रेत आहेत; सर्व आपआपल्या कक्षेत फिरत असतात. त्यांची आपसात टक्कर होत नाही.

६) याच्यात अल्लाहतआला, आंपल्या या उपकाराची चर्चा करीत आहे. की, त्याने तुमच्या करिता, समुद्रांमध्ये गलबतांचे चालणे सोपे करून दिले. येथ पावेतो कीं, तुम्ही आपल्या बरोबर, भरलेल्या गलबतांमध्ये, आपल्या मुलांना पण घेऊन जातात. दुसरा अर्थ हा केला गेला आहे की, संततीने उद्देश्य, संततीचे वाडवडील आहेत. आणि नौकेने अभिप्रेत ह. नूह عليه السلام ची नौका आहे. म्हणजे नूह. عليه السلام च्या नौकेत, त्या लोकांना बसविले, ज्यांच्या पासून नंतर मानव वंश चालला जणू मानव वंशाचे वाडवडील, हिच्यात स्वार होते.

७) याच्याने अभिप्रेत, अशा स्वाऱ्या आहेत, ज्या नौकेप्रमाणे, मनुष्यांना आणि व्यापारी मालाला, एका जागेवरून दुसऱ्या जागेवर घेऊन जातात. याच्यात कयामतपर्यंत निर्माण होणाऱ्या वस्तू येऊन गेल्यांत; जशी विमाने, समुद्रातील बोटी, रेल्वे बसेस, कारा, आणि दुसरी वाहतुकीची साधने.

८) म्हणजे एकेश्वरवाद आणि पैगंबराच्या सत्यतेची जी पण निशाणी त्यांच्या समोर येते तिच्यावर मनन करीत नाहीं कीं, जिच्यामुळे त्यांचा फायदा व्हावा. प्रत्येक निशाणीकडून तोंड फिरविणे ही त्यांची रीतच आहे.

وَ اِذَا قِیۡلَ لَهُمۡ اَنۡفِقُوۡا مِمَّا رَزَقَكُمُ اللّٰهُ ۙ قَالَ الَّذِیۡنَ كَفَرُوۡا لِلَّذِیۡنَ اٰمَنُوۡۤا اَنُطۡعِمُ مَنۡ لَّوۡ یَشَآءُ اللّٰهُ اَطۡعَمَهٗۤ ٭ۖ اِنۡ اَنۡتُمۡ اِلَّا فِیۡ ضَلٰلٍ مُّبِیۡنٍ ﴿۴۷﴾

**आणि जेव्हा यांना सांगण्यात येते की, अल्लाहतआलाने दिलेल्यातून काही द्या, (१) तर हे काफिर ईमानवाल्यांना उत्तर देतात कीं, आम्ही त्यांना का बरे खाऊ घालावे? त्यांना जर अल्लाहतआला, इच्छिता तर स्वत:च खाऊ पिऊ घालता, (२) तुम्ही तर धडधडीत चुकीत पडले आहात. (३) ४७**

وَ یَقُوۡلُوۡنَ مَتٰی هٰذَا الۡوَعۡدُ اِنۡ كُنۡتُمۡ صٰدِقِیۡنَ ﴿۴۸﴾

**ते म्हणतात कीं, हा वायदा केव्हा येणार, खरे आहात तर सांगा. ४८**

مَا یَنۡظُرُوۡنَ اِلَّا صَیۡحَةً وَّاحِدَةً تَاۡخُذُهُمۡ وَ هُمۡ یَخِصِّمُوۡنَ ﴿۴۹﴾

**त्यांना फक्त एका मोठ्या गर्जनेची प्रतीक्षा आहे, जी त्यांना येऊन पकडेल. आणि हे आपसांत लढाई झगड्यांतच व्यस्त असतील. (४) ४९**

فَلَا یَسۡتَطِیۡعُوۡنَ تَوۡصِیَةً وَّ لَاۤ اِلٰۤی اَهۡلِهِمۡ یَرۡجِعُوۡنَ ﴿۵۰﴾

**त्यावेळी न तर ते मृत्यूपत्र करू शकतील आणि न आपल्या पोरा बाळात परतून जाऊ शकतील. ५०**

وَ نُفِخَ فِی الصُّوۡرِ فَاِذَا هُمۡ مِّنَ الۡاَجۡدَاثِ اِلٰی رَبِّهِمۡ یَنۡسِلُوۡنَ ﴿۵۱﴾

**तर कुणी फुंकल्या गेल्या बरोबरच सर्वच्या (५) सर्व आपल्या थडग्यातून आपल्या पालनकर्त्याकडे (लवकर लवकर) चालू लागतील. ५१**

قَالُوۡا یٰوَیۡلَنَا مَنۢ بَعَثَنَا مِنۡ مَّرۡقَدِنَا ٜ هٰذَا مَا وَعَدَ الرَّحۡمٰنُ وَ صَدَقَ الۡمُرۡسَلُوۡنَ ﴿۵۲﴾

**म्हणतील, आम्हाला आमच्या शय्येवरून कोणी उठवून दिले; (६) हेच तर आहे, ज्याचा वायदा परम दयाळू (अल्लाह) ने दिला होता. आणि पैगंबरांनी खरे खरे सांगितले होते. ५२**

اِنۡ كَانَتۡ اِلَّا صَیۡحَةً وَّاحِدَةً فَاِذَا هُمۡ جَمِیۡعٌ لَّدَیۡنَا مُحۡضَرُوۡنَ ﴿۵۳﴾

**हे नाही! परंतु एक भयंकर आवाज, की, एकाएकी सारेचे सारे, गोळा होऊन आमच्या समोर हजर केले जातील. ५३**

فَالۡیَوۡمَ لَا تُظۡلَمُ نَفۡسٌ شَیۡـًٔا وَّ لَا تُجۡزَوۡنَ اِلَّا مَا كُنۡتُمۡ تَعۡمَلُوۡنَ ﴿۵۴﴾

**मग आज कोण्या मनुष्यावर काही पण जुलूम केला जाणार नाही; आणि तुम्हांस फक्त तुम्ही केलेल्या कामांचाच बदला दिला जाईल. ५४**

اِنَّ اَصۡحٰبَ الۡجَنَّةِ الۡیَوۡمَ فِیۡ شُغُلٍ فٰكِهُوۡنَ ﴿۵۵﴾

**स्वर्गवासी लोक आजच्या दिवशी, मौजेने आपले मनोरंजन करीत असतील. (७) ५५**

१) म्हणजे गरीब, मोहताज आणि गरजवंतांना द्या.
२) म्हणजे जर अल्लाह इच्छिता तर, त्यांना गरीबच न करता. आम्ही त्यांना देऊन, अल्लाहच्या मर्जीच्या विरूध्द का करावे.
३) म्हणजे हे सांगून की, गरीबांची मदत करा, धडधडीत चुकीला जाहीर करत आहात ही गोष्ट तर त्यांची बरोबर होती कीं, दारिद्रय आणि नादारी, अल्लाहच्या मर्जीनेच होती. परंतु याला अल्लाहच्या हुकुमाकडून, आक्षेपाला, सबब बनविणे चुक होते. शेवटी त्यांची मदत करण्याचा हुकूम देणारा पण तर अल्लाहच होता. म्हणून त्याची प्रसन्नता तर याच्यांतच आहे कीं, गरीब मोहताजांची मदत केली जावी. यासाठी की मर्जी, एक गोष्ट आहे. आणि प्रसन्नता ही आणखी गोष्ट आहे. मर्जीचा संबंध दैवी मांडणीशी आहे. ज्याच्या अंतर्गत, जे काही पण होते, त्याचे प्रयोजन आणि त्यांत लपलेले शहाणपण अल्लाहशिवाय कोणाला ठाऊक नाही. आणि प्रसन्नतेचा संबंध धर्मशास्त्राच्या हुकूमाशी आहे, ज्यांना करण्याचा आम्हाला हुकूम देण्यात आला आहे कीं, आम्हांस त्याची प्रसन्नता प्राप्त व्हावी.
४) म्हणजे लोक बाजारात खरेदी विक्री, आणि सवयी प्रमाणे वादविवाद आणि झगड्यांत व्यस्त असतील की, अचानक कर्णा फुंकून दिला जाईल, आणि कयामत घडून येईल. हा पहिला कर्णा असेल ज्याला 'नफखा फजअ' पण म्हणतात. असे म्हणतात कीं याच्यानंतर दुसरा कर्णा होईल, 'नफखतुल् सअक', ज्याच्याने अल्लाहतआला शिवाय सर्वलोक मृत्यू पाऊन जातील.
५) पहिल्या म्हणण्याच्या आधारावर हा दुसरा कर्णा आणि दुसऱ्या म्हणण्याच्या आधारावर हा तिसरा कर्णा असेल. याला 'नफखतुल बआसे वन्नुशुर' म्हणतात. याच्याने लोक थडग्यातून जिवंत होऊन उठून उभे राहतील. (इब्ने कसीर)
६) थडग्याला शय्यागृहाने संबोधित करण्याचा अर्थ हा नाही कीं, त्यांना कबरेमध्ये अजाब होणार नाहीं. किंबहुना नंतर जी भयानक दृश्यें आणि शिक्षेची तिव्रता पाहतील. याच्या तुलनेत त्यांना कबरीतील जीवन एक स्वप्नच वाटेल.
७) फाकिहूनचा अर्थ आहे, 'फरीहून', आनंदीत, आनंद प्राप्त झालेला.

هُمۡ وَأَزۡوَٰجُهُمۡ فِي ظِلَٰلٍ عَلَى ٱلۡأَرَآئِكِ مُتَّكِـُٔونَ ٥٦
ते आणि त्यांच्या पत्न्या, छायेमध्ये, तक्त्यांवर तक्के लावून बसलेल्या असतील ५६

لَهُمۡ فِيهَا فَٰكِهَةٞ وَلَهُم مَّا يَدَّعُونَ ٥٧
त्यांच्याकरिता स्वर्गांत, प्रत्येक प्रकाराचे मेवे असतील; आणि आणखी जे काही ते मागतील. ५७

سَلَٰمٞ قَوۡلٗا مِّن رَّبّٖ رَّحِيمٖ ٥٨
परम दयाळू पालनकर्त्यांकडून त्यांना सलाम सांगण्यात येईल. (१) ५८

وَٱمۡتَٰزُواْ ٱلۡيَوۡمَ أَيُّهَا ٱلۡمُجۡرِمُونَ ٥٩
हे गुन्हेगारांनो! आज तुम्ही वेगळे होऊन जा. (२) ५९

أَلَمۡ أَعۡهَدۡ إِلَيۡكُمۡ يَٰبَنِيٓ ءَادَمَ أَن لَّا تَعۡبُدُواْ ٱلشَّيۡطَٰنَۖ إِنَّهُۥ لَكُمۡ عَدُوّٞ مُّبِينٞ ٦٠
हे आदमच्या मुलांनो! काय मी तुमच्याकडून वचन घेतले नव्हते की, तुम्ही शैतानाची उपासना करूं नका? (३) तो तर तुमचा उघड़ शत्रू आहे. (४) ६०

وَأَنِ ٱعۡبُدُونِيۚ هَٰذَا صِرَٰطٞ مُّسۡتَقِيمٞ ٦١
आणि माझीच उपासना करावी; (५) सरळ मार्ग हाच आहे. (६) ६१

وَلَقَدۡ أَضَلَّ مِنكُمۡ جِبِلّٗا كَثِيرًاۖ أَفَلَمۡ تَكُونُواْ تَعۡقِلُونَ ٦٢
शैतानाने तर तुमच्यातून बहुतेक लोकांना बहकवून टाकले होते; तर काय तुम्ही अक्कल बाळगत नाही? (७) ६२

هَٰذِهِۦ جَهَنَّمُ ٱلَّتِي كُنتُمۡ تُوعَدُونَ ٦٣
हाच तो नरकाग्नी आहे, ज्याचा तुम्हांस वायदा दिला जात होता. ६३

ٱصۡلَوۡهَا ٱلۡيَوۡمَ بِمَا كُنتُمۡ تَكۡفُرُونَ ٦٤
आपल्या कुफ्रचा बदला मिळविण्यासाठी, आज याच्यात दाखल होऊन जा. (८) ६४

१) अल्लाह्चा हा सलाम, देवदूत स्वर्गवाल्यांना पोहचवतील. काही म्हणतात की, अल्लाहृतआला स्वत: सलाम सांगेल.

२) म्हणजे ईमानवाल्यांपासून वेगळे होऊन उभे रहा. म्हणजे हशरच्या मैदानात, ईमानवाले आणि आज्ञाधारक, आणि कुफ्रवाले आणि गुन्हेगार वेगवेगळे करून दिले जातील. जसे दुसऱ्या ठिकाणी, सांगितले, ''त्यादिवशी लोक दोन गटात विभागले जातील;'' (सू.रूम-१४) दुसरा अर्थ आहे की, गुन्हेगारांना वेगवेगळ्या गटात विभागून टाकण्यांत येईल. उदाहरणार्थ यहुद्यांचा समूह, ख्रिस्त्यांचा समूह, नक्षत्रपूजक आणि अग्नी पुजकांचा समूह, व्याभिचारी लोकांचा, दारूड्या लोकांचा समूह वगैरे वगैरे.

३) याच्याने अभिप्रेत अहदे अलस्त आहे, जे ह. आदम عليه السلام च्या पाठीतून काढण्याच्या वेळी घेण्यात आले होते; किंवा तो उद्देश आहे, जो पैगंबरांच्या मुखाने, लोकांना केला जात आलेला आहे. आणि काहींच्या जवळ, ती बौध्दीक प्रमाणे आहेत, जी आकाश आणि पृथ्वीत, अल्लाहने कायम केली आहेत. (फत्हुल कदीर)

४) हे याचे करण आहे कीं, तुम्हास शैतानाची उपासना आणि त्याचे कडून, मनांत टाकले गेलेले वाईट विचार, मान्य करण्यापासून यासाठी रोकण्यात आले होते कीं, तो तुमचा उघड शत्रू आहे. आणि त्याने तुम्हास कुठल्याही प्रकारे बहकविण्याची शपथ घेऊन ठेवली आहे.

५) म्हणजे हे पण वचन घेतले होते कीं, तुम्हास फक्त माझीच उपासना करावयाची आहे. माझ्या उपासनेत कोणाला सरकतदार करू नये.

६) म्हणजे फक्त एका अल्लाह्ची उपासना करावी. हाच तो सरळ मार्ग आहे, ज्याच्याकडे सर्व पैगंबर, लोकांना बोलावित राहिले. आणि हेच निर्धारित लक्ष, म्हणजे स्वर्गापर्यंत पोहचवणारा आहे.

७) म्हणजे एवढी अक्कलपण तुमच्या ठिकाणी नाहीं, कीं, शैतान तुमचा शत्रू आहे. त्याचे आज्ञापालन करावयास नको. आणि मी तुमचा पालनकर्ता आहे; मीच तुम्हास रोजी देतो; आणि मीच तुमचे रात्रंदिवस संरक्षण करतो. तुम्ही माझे आज्ञाभंजन करू नये. तुम्ही शैतानाच्या शत्रुत्वाला, आणि माझ्या उपासनेच्या हक्काला न जाणून फारच बुध्दीहीनतेचे आणि नादानीचे प्रदर्शन करीत आहात.

८) म्हणजे आता या मूर्खतेचा परिणाम भोगा आणि आपल्या कुफ्रमुळे नरकाग्नीच्या कडक शिक्षेची मजा चाखा.

ٱلْيَوْمَ نَخْتِمُ عَلَىٰٓ أَفْوَٰهِهِمْ وَتُكَلِّمُنَآ أَيْدِيهِمْ وَتَشْهَدُ أَرْجُلُهُم بِمَا كَانُوا۟ يَكْسِبُونَ ﴿٦٥﴾

आम्ही आजच्या दिवशी त्यांच्या तोंडावर मोहर लावून टाकू. आणि त्यांचे हात आमच्याशी गोष्टी करतील, आणि त्यांचे पाय, साक्षी देतील त्या कामांची जे ते करीत असत. (१) ६५

وَلَوْ نَشَآءُ لَطَمَسْنَا عَلَىٰٓ أَعْيُنِهِمْ فَٱسْتَبَقُوا۟ ٱلصِّرَٰطَ فَأَنَّىٰ يُبْصِرُونَ ﴿٦٦﴾

जर आम्ही इच्छितो, तर त्यांचे डोळे दृष्टीहीन करून टाकतो; मग हे मार्गाकडे धावते, परंतु त्यांना कसे दिसले असते? (२) ६६

وَلَوْ نَشَآءُ لَمَسَخْنَٰهُمْ عَلَىٰ مَكَانَتِهِمْ فَمَا ٱسْتَطَٰعُوا۟ مُضِيًّا وَلَا يَرْجِعُونَ ﴿٦٧﴾

ع ٤ ١٧ ٣ | ४ १७ ३

आणि जर आम्ही इच्छितो, तर यांना जागेवरच, यांचे चेहरे विद्रुप करून टाकले असते; मग न ते चालू शकले असते, आणि न परत फिरूशकले असते. (३) ६७

وَمَن نُّعَمِّرْهُ نُنَكِّسْهُ فِى ٱلْخَلْقِ ۖ أَفَلَا يَعْقِلُونَ ﴿٦٨﴾

आणि ज्याला आम्ही म्हातारा करतो, त्याला जन्माच्या वेळच्या स्थितीकडे पुन्हा परतवून देत असतो; (४) तर काय तरी सुध्दा ते समजत नाही? (५) ६८

وَمَا عَلَّمْنَٰهُ ٱلشِّعْرَ وَمَا يَنۢبَغِى لَهُۥٓ ۚ إِنْ هُوَ إِلَّا ذِكْرٌ وَقُرْءَانٌ مُّبِينٌ ﴿٦٩﴾

न तर, आम्ही या पैगंबरास काव्य शिकविले,न हा त्याच्या योग्य आहे ते तर फक्त उपदेश आणि खुले कुरआन आहे. (६) ६९

لِّيُنذِرَ مَن كَانَ حَيًّا وَيَحِقَّ ٱلْقَوْلُ عَلَى ٱلْكَٰفِرِينَ ﴿٧٠﴾

कारण कीं त्याने प्रत्येक त्या माणसाला सावध करून द्यावे, जो जिवंत आहे. (७) आणि काफिरांवर प्रमाण सिध्द होऊन जावे. (८) ७०

أَوَلَمْ يَرَوْا۟ أَنَّا خَلَقْنَا لَهُم مِّمَّا عَمِلَتْ أَيْدِينَآ أَنْعَٰمًا فَهُمْ لَهَا مَٰلِكُونَ ﴿٧١﴾

काय ते पाहत नाहीत की, आम्ही आपल्या हातांनी बनविलेल्या (९) वस्तुंमधून, त्यांच्याकरिता चतुष्पाद जनावरे (१०) पण निर्माण करून दिलीत, ज्यांचे हे मालक होऊन गेले आहेत. (११) ७१

وَذَلَّلْنَٰهَا لَهُمْ فَمِنْهَا رَكُوبُهُمْ وَمِنْهَا يَأْكُلُونَ ﴿٧٢﴾

आणि या पाळीव प्राण्यांना आम्ही त्यांच्या वशी करून दिले आहे. (१२) यांच्यातून काही तर यांच्या स्वाऱ्या आहेत, आणि काहींचे मांस, खातात ७२

وَلَهُمْ فِيهَا مَنَٰفِعُ وَمَشَارِبُ ۖ أَفَلَا يَشْكُرُونَ ﴿٧٣﴾

त्यांना यांच्यापासून आणखी पुष्कळसे फायदे आहेत. (१३) विशेषत: (दुधाचे) पेये; काय तरी सुध्दा हे आभार मानत नाहीत? ७३

وَٱتَّخَذُوا۟ مِن دُونِ ٱللَّهِ ءَالِهَةً لَّعَلَّهُمْ يُنصَرُونَ ﴿٧٤﴾

आणि ते अल्लाहशिवाय इतरांना उपास्य बनवितात; या विचाराने की त्यांची मदत केली जावी. (१४) ७४

لَا يَسْتَطِيعُونَ نَصْرَهُمْ وَهُمْ لَهُمْ جُندٌ مُّحْضَرُونَ ﴿٧٥﴾

खचित्‌च यांच्यात त्यांच्या मदतीची शक्तीच नाही. परंतु तरी सुध्दा(मुशरिक लोक) त्यांच्यासाठी हजर केलेले सैन्य आहे. (१५) ७५

१) ही मोहोर लावण्याची आवश्यकता यासाठी पुढे येईल की, सुरवातीला मुशरिक लोक, कयामतच्या दिवशी सुध्दा खोटे बोलतील, आणि म्हणतील, ''अल्लाहची शपथ! जो आमचा पालनकर्ता आहे, आम्ही शिर्क करणारे नव्हतो.'' (सू.अन्‌आम-२३) म्हणून अल्लाहतआला त्यांच्या तोंडावर मोहोर लावून टाकेल. ज्याच्याने ते स्वत: बोलण्याच्या क्षमतेपासून वंचित होऊन जातील. तथापि अल्लाहतआला मनुष्याच्या अवयवांना बोलण्याचे सामर्थ्य बहाल करून टाकेल. हात सांगतील की, आम्हापासून याने अमुक अमुक काम घेतले होते. आणि पाय याच्यावर साक्ष देतील. अशाप्रकारे जणू कबुली आणि साक्ष, दोन्ही बाबी पार पडून जातील. याशिवाय, बोलणाऱ्याच्या मुकाबल्यात, न बोलणाऱ्या वस्तुंचे बोलून, साक्ष देणे, तर्क आणि पुराव्यांत, जास्त उत्कृष्ठ आहे की, यांच्यात एक चमत्कारीक शान दिसून येते (फत्हुल कदीर) या विषयाला हदीसीमध्ये सुध्दा सांगण्यांत आले आहे. (कृपया पहावे,सहीह मुस्लिम)

२) म्हणजे दृष्टीपासून वंचित झाल्यानंतर, त्यांना मार्ग कसा दिसता? परंतु ही तर आमची दयार्द्रता आणि कृपा आहे कीं, आम्ही असे केले नाही.

३) म्हणजे न पुढे जाऊ शकते न परत फिरूंशकते किंबहुना दगडा सारखे एकाच ठिकाणी पडून राहते, 'मसख' चा अर्थ निर्मिती मध्ये फेरफार चा आहे. म्हणजे मनुष्यांमध्ये दगड किंवा जनावराच्या रूपात बदलून टाकणे.

४) म्हणजे ज्यांना आम्ही दीर्घ आयुष्य देतो, त्यांच्या निर्मितीला बदलून उलट अवस्था करून देतो. म्हणजे दीर्घ

म्हणजे जेव्हा तो मूल असतो, तेव्हा त्यांचे संगोपन चालूअसते. आणि त्याच्या बौध्दीक आणि शारीरिक सामर्थ्यांत वाढ होत राहते. येथ पावेतो की, तो तारूण्य आणि प्रौढावस्थेला पोहचून जातो. याच्या नंतर याच्या उलट, त्याच्या बौद्धीक आणि शारीरिक क्षमतेत, दौर्बल्य आणि ऱ्हासाचे काम सुरू होऊन जाते. येथ पावेतो कीं, तो एखाद्या लहान मुलासारखा होऊन जातो.

५) की, जो अल्लाह, अशाप्रकारे करूशकतो, तर काय तो दुसऱ्यांदा माणसांना जिवंत करण्यास समर्थ नाही?

६) मक्केचे मुशरिक, नबी ﷺ ला खोटे ठरविण्यासाठी, निरनिराळ्या प्रकारच्या गोष्टी सांगत. त्यात एक गोष्ट ही पण होती की, आपण कवी आहेत. आणि हे पवित्र कुरआन आपली काव्यरचना आहे. अल्लाह्तआलाने याचे खंडन केले की, न आपण कवी आहोत, न कुरआन काव्य संग्रह आहे. किंबहुना हे तर फक्त उपदेश व प्रवचन आहे. काव्यामध्ये, सर्व साधारणत: अतिशायोक्ती, वाढ आणि कमी करणे, आणि निव्वळ कल्पनांचा विलास असतो. अशाप्रमाणे जणू त्याचा पाया असत्यावरच असतो. याशिवाय कवी नुसते बोलतात, करीत काहीच नाही, म्हणून अल्लाह्तआलाने फार्माविले कीं, आमच्या पैगंबराला आम्ही फक्त काव्य शिकविले नाहीं; न काव्य याच्यावर अवतरीत केले. किंबहुना त्याच्या प्रकृति व स्वभावाला असे बनविले कीं, काव्याशी याचा काही संबंधच नाही, हेच कारण आहे की, आपण ﷺ जेव्हा कधी कोणाचे काव्य म्हणत, तर बहुतेक बरोबर म्हणूशकत नव्हते. ज्याची उदाहरणे हदीसींमध्ये आढळून येतात. ही सावधानता यासाठी घेण्यांत आली कीं, नाकारणाऱ्यांवर तर्क पूर्ण व्हावा; आणि त्यांच्या शंकाकुशंका संपवून टाकल्या जाव्यात आणि त्यांनी असे म्हणू शकूं नये की, हे कुरआन त्याच्या काव्य रचनेचा परिणाम आहे. ज्याप्रमाणे आपली निरक्षरता सुध्दा, शंकेच्या निर्सना करता होती. कारण कीं, लोकांनी कुरआनाच्या बाबतीत, असे म्हणूशकू नये की, हे तर याने अमक्या कडून शिकून वाचून याला रचून घेतले आहे. तथापि काही प्रसंगी, आपल्या शुभमुखाने, असे शब्द निघून जाणे, जे दोन काव्य पंक्ती प्रमाणे असत आणि काव्याला रचनेसारखे सुद्धा असत. हे आपल्या कवी होण्याचे प्रमाण बनूशकत नाही. कारण कीं, असे आपल्या प्रयत्न आणि इराद्याशिवाय झाले. आणि त्यांचे काव्याच्या ढगात घडून जाणे, एक योगायोग होता, ज्या प्रमाणे हुनैनच्या दिवशी, आपल्या मुखाने नकळत, युध्दात म्हणावयाचे शेर(काव्य), बाहेर पडले. ''अनन् नबीय्यु, ला कजिब, अनब्नो अबदिल् मुत्तलिब.'' एका आणखी प्रसंगी, आपले बोट जखमी झाले, तेव्हा आपण फर्माविले, ''हल अन्ती इल्ला इस्सबऊन दमयृति व फी सबीलिल्लाहि् मा लकयृति.'' (स. बुखाारी स. मुस्लिम)

७) म्हणजे ज्याचे अंत:करण बरोबर आहे, तोच सत्याला कबूल करतो. आणि असत्याला नाकारतो.

८) म्हणजे जो कुफ्रवर अडीग असेल, त्याच्यावर शिक्षेची गोष्ट सिध्द होईल.

९) याच्यात दुसऱ्यांच्या भागीदारीचे खंडन आहे. यांना आम्ही आपल्या हातांनी बनविले आहे. कोण्या दुसऱ्याचा यांच्या बनविण्यात वाटा नाही.

१०) 'अन्आम' 'नअम' चे अनेकवचन आहे. याच्याने अभिप्रेत चतुष्पाद म्हणजे, उंट, गाय, बकरी (आणि मेंढी, दुंबा) आहेत.

११) म्हणजे ज्याप्रमाणे इच्छितात, यांना हाताळतात; जर आम्ही त्यांच्यात दहशत ठेवली असती (जशी कीं, काही जनावरात असते) तर हे चतुष्पाद त्यांच्यापासून दूर पळाले असते. आणि ते यांच्या कबजात येऊ शकले नसते.

१२) म्हणजे या जनावरांपासून ते ज्याप्रकारचा पण फायदा उचलू इच्छितात, ते त्याला नाकारत नाहीत. येथ पावेतो कीं, ते त्यांना जबाहपण करून टाकतात. आणि लहान मुले सुध्दा त्यांना ओढत फिरतात.

१३) म्हणजे स्वारी आणि खाण्याशिवाय, सुध्दा त्यांचेपासून पुष्कळसे फायदे प्राप्त केले जातात. उदाहरणार्थ, त्यांच्या लोकर आणि केसांपासून कित्येक वस्तू बनतात. त्यांच्या चरबीपासून तेल मिळविले जाते. आणि ते ओझे वहाणे आणि शेती वाडीच्या पण कामात येतात.

१४) हा त्यांच्या देणग्यांच्या प्रति कृतघ्नतेचे जाहीर करणे आहे कीं, चर्चित देणग्या, ज्या पासून हे फायदा उचलतात, सर्व अल्लाहची निर्माण केलेली आहेत. परंतु हे अल्लाहच्या या देणग्यांवर आभार मानण्याऐवजी, म्हणजे त्याची उपासना ाआणि आज्ञापालन करण्याऐवजी, हे दुसऱ्यांशी आशा बाळगून आहेत, आणि त्यांना उपास्य बनवतात.

१५) 'जुन्दुन्' ने अभिप्रेत, मुर्त्यांचे पुरस्कर्ते, आणि त्यांचा पक्ष घेणारे, 'मुहजरून' जगांत यांच्या जवळ हाजीर होणारे; अर्थ हा आहे कीं, हे ज्या मूर्त्यांना उपास्य समजत आहेत ते त्यांची मदत काय करतील? ते तर स्वत:च आपली मदत करण्यास असमर्थ आहेत. त्यांना कोणी वाईट म्हणेल, त्यांची निंदा करील, हेच त्यांचा पुरस्कार करण्यात, त्यांचा पक्ष घेण्यात, अग्रेसर राहतात, न की स्वत: यांचे ते उपास्य.

فَلَا يَحْزُنْكَ قَوْلُهُمْ ۘ اِنَّا نَعْلَمُ مَا يُسِرُّوْنَ وَمَا يُعْلِنُوْنَ ﴿٧٦﴾

तर आपणास त्याची ही गोष्ट खेदजनक होऊ नये. आम्ही त्यांच्या गुप्त आणि उघड सर्व गोष्टींना, चांगल्या प्रकारे जाणतो. (७६)

اَوَلَمْ يَرَ الْاِنْسَانُ اَنَّا خَلَقْنٰهُ مِنْ نُّطْفَةٍ فَاِذَا هُوَ خَصِيْمٌ مُّبِيْنٌ ﴿٧٧﴾

काय मनुष्याला इतके पण ठाऊक नाही की, त्याला विर्यबिंदुतून निर्माण केले आहे? तरी सुद्धा तो उघड उघड भांडखोर होऊन गेला (७७)

وَضَرَبَ لَنَا مَثَلًا وَّنَسِيَ خَلْقَهٗ ؕ قَالَ مَنْ يُّحْيِ الْعِظَامَ وَهِيَ رَمِيْمٌ ﴿٧٨﴾

आणि आम्हासच गोष्टी ऐकवू लागला; आणि आपली मूळ उत्पत्ती विसरून गेला. म्हणू लागला, त्या गळून सडून गेलेल्या हाडांना, कोण जिवंत करूशकतो? (७८)

قُلْ يُحْيِيْهَا الَّذِيْۤ اَنْشَاَهَاۤ اَوَّلَ مَرَّةٍ ؕ وَهُوَ بِكُلِّ خَلْقٍ عَلِيْمٌ ﴿٧٩﴾

आपण उत्तर द्या की, त्यांना तो जिवंत करील ज्याने त्यांना प्रथमत: निर्माण केले आहे,(१) जो सर्व प्रकारचे निर्माण करणे, चांगल्या प्रकारे जाणतो. (७९)

اِۨلَّذِيْ جَعَلَ لَكُمْ مِّنَ الشَّجَرِ الْاَخْضَرِ نَارًا فَاِذَاۤ اَنْتُمْ مِّنْهُ تُوْقِدُوْنَ ﴿٨٠﴾

तोंच, ज्याने तुमच्या करितां हिरव्या वृक्षांतून आग निर्माण करून दिली. ज्याच्यातून तुम्ही (आणखी) आग पेटवून घेता(२) (८०)

اَوَلَيْسَ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ بِقٰدِرٍ عَلٰۤى اَنْ يَّخْلُقَ مِثْلَهُمْ ؕ بَلٰى ۗ وَهُوَ الْخَلّٰقُ الْعَلِيْمُ ﴿٨١﴾

ज्याने आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले आहे, काय तो यांच्या सारख्यांना(३) निर्माण करण्यांस समर्थ नाही? नि:संशय समर्थ आहे. आणि तो तर (मोठा) निर्माण करणारा निपूण, (जाणकार) आहे. (८१)

اِنَّمَاۤ اَمْرُهٗۤ اِذَاۤ اَرَادَ شَيْـًٔا اَنْ يَّقُوْلَ لَهٗ كُنْ فَيَكُوْنُ ﴿٨٢﴾

तो जेव्हा कोण्या गोष्टीचा इरादा करतो, त्याला एवढे सांगून टाकणे पुरेसे आहे की, होऊन जा! आणि त्याच वेळी ती होऊन जाते.(४) (८२)

فَسُبْحٰنَ الَّذِيْ بِيَدِهٖ مَلَكُوْتُ كُلِّ شَيْءٍ وَّاِلَيْهِ تُرْجَعُوْنَ ﴿٨٣﴾

तर परम पवित्र आहे तो अल्लाह्, ज्याच्या हातात प्रत्येक वस्तुचा पूर्ण अधिकार आहे.(५) आणि ज्यांच्याकडे तुम्ही सर्व पालटून नेले जाल(६) (८३)

१) म्हणजे जो अल्लाह् मनुष्याला एका क्षुल्लक वीर्य बिंदुपासून उत्पन्न करतो, तो त्याला दुसऱ्यादा जिवंत करण्यावर समर्थ नाही? त्याच्या मृताला जिवंत करून देण्याची एक घटना हदीसमध्ये सांगण्यात आली आहे कीं, एका मनुष्याने मरतेवेळी, इच्छा व्यक्त केली कीं, मेल्यानंतर त्याला जाळून, त्याची अर्धी राख समुद्रामध्यें, आणि अर्धी राख सोसाट्याच्या वाऱ्याच्या दिवशीं, जमिनीवर उडवून देण्यात यावी. अल्लाहने सर्व रोख गोळा करून, त्याला जिवंत केले. आणि विचारले तूअसे का केलेस? त्याने सांगितले, तुझ्या भीतीमुळे म्हणून अल्लाह्ने त्याला क्षमा करून टाकले. (स.बुखारी)

२) असे म्हणतात की, अरबस्थानांत दोन वृक्ष आहेत, 'मिर्ख आणि अफार' यांची दोन लाकडे, आपसात घासली जातील, तर आग निर्माण होते. हिरव्या वृक्षापासून आग निर्माण करण्याच्या हवाल्याने, याचकडे इशारा करण्याचा उद्देश्य आहे.

३) म्हणजे माणसांसारखे. अर्थ माणसांना दुसऱ्यांदा निर्माण करणे आहे. ज्याप्रमाणे त्यांना पहिल्या वेळेस निर्माण केले. आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीपासून, माणसांना दुसऱ्यादा निर्माण करण्यावर, आधार घेतला आहे. ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आकाश आणि पृथ्वीची निमीर्ती, माणसांच्या निर्मितीपेक्षा जास्त कठीण काम आहे.'' (सू.मोमिन-५७) सू. अहकाफ आ. ३३ मध्यें सुध्दां, हा विषय सांगण्यात आला आहे.

४) म्हणजे याची शान तर ही आहे.'' मग त्याच्यासाठी सर्व माणसांना जिवंत करून देणे कोणता कठीण मामला आहे?

५) 'मुल्क' आणि 'मल्कूत' दोघांचा अर्थ, एकच आहे, बादशाही.

६) म्हणजे असे होणार नाही कीं, मातीत मिसळून, तुमचे अस्तित्व कायमचे नष्ट होऊन जावे. किंबहुना त्याला दुसऱ्यादा अस्तित्व बहाल केले जाईल. असे पण होणार नाही की, तुम्ही पळून जाऊन, आणखी कोणाकडे आश्रय मागून घ्यावा. तुम्हांला कोठल्याही परिस्थितीत अल्लाह्च्याच समक्ष हजर व्हावे लागेल. जेथे तो कर्माच्या नुसार चांगला किंवा वाईट मोबदला देईल.

महावाक्ये १८२ | # (३७) सू. साफ्फात | रुकूअ ५

آياتها ١٨٢ (٣٧) سُوْرَةُ الصّٰفّٰتِ مَكِّيَّةٌ (٥٦) رُكُوعَاتُهَا ٥

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَالصّٰٓفّٰتِ صَفًّا ۝١

**शपथ आहे रांगा बांधणाऱ्यांची (देवदूतांची) (१)**

فَالزّٰجِرٰتِ زَجْرًا ۝٢

**मग चांगल्याप्रकारे दपटणाऱ्यांची (२)**

فَالتّٰلِيٰتِ ذِكْرًا ۝٣

**मग कुरआनाचे पठन करणाऱ्यांची. (३)**

اِنَّ اِلٰهَكُمْ لَوَاحِدٌ ۝٤

**खचित्च तुमचा उपास्य एकच[१] आहे. (४)**

رَبُّ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا وَرَبُّ الْمَشَارِقِ ۝٥

**आकाश, पृथ्वी आणि त्यांच्या दर्म्यानच्या तमाम वस्तू आणि मशारिकचा पालनकर्ता तोच आहे.[२] (५)**

اِنَّا زَيَّنَّا السَّمَآءَ الدُّنْيَا بِزِيْنَةِ ۨالْكَوَاكِبِ ۝٦

**आम्ही जगाच्या या आकाशाला, नक्षत्रांच्या शोभेने सुशोभित करून दिले आहे (६)**

وَحِفْظًا مِّنْ كُلِّ شَيْطٰنٍ مَّارِدٍ ۝٧

**आणि आम्हीच प्रत्येक खोडकर शैतानापासून[३] त्याचे संरक्षण केले आहे. (७)**

१) साफ्फात, जाजिरात, तालीयात, देवदुतांची वैशिष्ट्ये आहेत. आकाशांवर अल्लाहच्या उपासनेकरिता रांग बांधणारे, किंवा अल्लाहच्या हुकूमाच्या प्रतिक्षेत रांगा बांधून असलेले, हितोपदेशाच्या मार्फत लोकांना दटाविणारे, किंवा ढगांना, जेथे अल्लाहचा हुकूम होईल तेथे हाकलून घेऊन जाणारे अल्लाहचे स्मरण आणि कुरआनाचे पठन करणारे या देवदुतांची शपथ खाऊन अल्लाहतआलाने विषय हा सांगितला की, सर्व मनुष्यांचा उपास्य एकच आहे; अनेक नाही. जसे की, मुशरिकांनी (अनेक उपास्य) बनविले आहेत. सर्वसाधारण पणे शपथ, ताकीद, आणि शंका दूर करण्यासाठीं, घेण्यांत येते, अल्लाहतआलाने येथे शपथ,या शंकेला दूर करण्यासाठी, घेतली आहे, जे मुशरिकलोक, त्याच्या एक होण्यावर आणि उपास्य होण्याच्या बाबतीत (शंका) पसरवीत असतात. या शिवाय प्रत्येक वस्तुंअल्लाहची निर्मित आणि त्याच्या मालकीची आहे. याकरीता तो कोणत्याही वस्तूला साक्षी ठेऊन शपथ घेईल तर त्याच्यासाठी योग्य आहे. परंतु मनुष्यांकरिता, अल्लाहच्या शिवाय, आणखी कोणाची शपथ खाणे, बिल्कुल अयोग्य आणि हराम आहे. कारण कीं शपथेत, ज्याची शपथ घेतली जाते, त्याला साक्ष्य बनविणे, हा उद्देश्य असतो, आणि साक्षीदार अल्लाहच्या शिवाय कोणी बनूशकत नाही. कारण की, अदृष्टाचा ज्ञाता फक्त तोच आहे. त्याच्या शिवाय कोणी अदृष्टाचा ज्ञाता नाही.

२) अर्थ आहे, पूर्व आणि पश्चिमेचा पालनकर्ता. अनेक वचनी शब्द यासाठी वापरण्यात आला आहे, काही म्हणतात कीं, वर्षाच्या दिवसांची संख्येच्या बरोबर पूर्व आणि पश्चिम आहेत. सूर्य रोज एका पूर्वेतून निघतो आणि एका पश्चिमेत अस्त पावतो. आणि सू.रहमान मध्ये पूर्वेत्तर आणि पश्चिमेत्तर दोहोंच्या अनेकवचनात आला आहे. म्हणजे दोन पूर्व व दोन पश्चिम याच्याने अभिप्रेत ते दोन पूर्व पश्चिम आहेत. ज्यांच्यातून सूर्य उन्हाळ्यात आणि हिवाळ्यात निघतो आणि अस्त पावतो. म्हणजे एक अती शेवटची पूर्व आणि पश्चिम आणि दुसरी संक्षिप्त किंवा अती जवळची पूर्व आणि पश्चिम; आणि पूर्व आणि पश्चिमेला एक एकटा उल्लेख केला गेला आहे, याच्याने अभिप्रेत ती दिशा आहे, जेथून सूर्य उदय होतो आणि अस्त होतो. (फत्हुल कदीर)

३) म्हणजे जगाच्या आकाशावर, शोभे शिवाय, ताऱ्यांचा दुसरा उद्देश्य हा आहे. कीं, शिरजोर शैतानांपासून संरक्षण व्हावे. म्हणून शैतान आकाशांत कोणी गोष्ट ऐकण्यासाठी जातात, तर तारे त्यांच्यावर तुटून पडतात. ज्यामुळे साधारणपणे शैतान जळून जातात. जसे की पुढचे महावाक्य आणि हदीशींनी स्पष्ट आहे. ताऱ्यांचा एक तिसरा उद्देश्य, रात्रीच्या अंध:कारांत मार्गदर्शन पण आहे. जसे की, कुरआनामध्ये दुसऱ्या ठिकाणी सांगण्यांत आले आहे. या तीन उद्देश्यांशिवाय, ताऱ्यांचा आणखी काही उद्देश्य सांगण्यात आलेला नाही.

لَا يَسَّمَّعُوْنَ اِلَى الْمَلَاِ الْاَعْلٰى وَ يُقْذَفُوْنَ مِنْ كُلِّ جَانِبٍ ﴿۸﴾

उच्च जगताच्या देवदूतांच्या गोष्टी ऐकण्याकरता, ते कान पण लाऊ शकत नाहीत किंबहुना चाऱ्ही बाजूने त्यांच्यावर आगीचे लोळ सोडले जातात ८

دُحُوْرًا وَّ لَهُمْ عَذَابٌ وَّاصِبٌ ﴿۹﴾

त्यांना हाकलण्यासाठी, आणि त्यांच्यासाठी कायमची शिक्षा आहे. ९

اِلَّا مَنْ خَطِفَ الْخَطْفَةَ فَاَتْبَعَهٗ شِهَابٌ ثَاقِبٌ ﴿۱۰﴾

होय! पण जो कोणी एखादी गोष्ट, घेऊन पळेल, तर लगेचच त्याच्या मागे, धगधगता अंगारा लागून जातो. १०

فَاسْتَفْتِهِمْ اَهُمْ اَشَدُّ خَلْقًا اَمْ مَّنْ خَلَقْنَا ؕ اِنَّا خَلَقْنٰهُمْ مِّنْ طِيْنٍ لَّازِبٍ ﴿۱۱﴾

या काफिरांना विचारा तर खरे! की काय, त्यांचे निर्माण करणे, जास्त कठीण आहे की, ज्यांना आम्ही निर्माण केले? [१] आम्ही माणसांना चिकण्या माती पासून निर्माण केले आहे. [२] ११

بَلْ عَجِبْتَ وَ يَسْخَرُوْنَ ﴿۱۲﴾

किंबहुना तूआश्चर्य करीत आहेस आणि हे थट्टा करीत आहेत. [३] १२

وَ اِذَا ذُكِّرُوْا لَا يَذْكُرُوْنَ ﴿۱۳﴾

आणि जेव्हा यांना उपदेश केला जातो, तेव्हा बोध घेत नाहीत. १३

وَ اِذَا رَاَوْا اٰيَةً يَّسْتَسْخِرُوْنَ ﴿۱۴﴾

आणि जेव्हा कधी कोण्या चमत्काराला पाहतात, तेव्हा त्याची हंशी उडवितात. १४

وَ قَالُوْۤا اِنْ هٰذَاۤ اِلَّا سِحْرٌ مُّبِيْنٌ ﴿۱۵﴾

आणि म्हणतात की ही तर खुल्लम खुल्ला जादूच आहे. [४] १५

ءَاِذَا مِتْنَا وَ كُنَّا تُرَابًا وَّ عِظَامًا ءَاِنَّا لَمَبْعُوْثُوْنَ ﴿۱۶﴾

काय जेव्हांआम्ही मरून जाऊ, आणि माती आणि हाडे होऊन जाऊ, तर काय आम्ही खरोखर जिवंत केले जाऊ? १६

اَوَ اٰبَآؤُنَا الْاَوَّلُوْنَ ﴿۱۷﴾

किंवा आमच्या पूर्वीचे आमचे वाडवडील सुध्दा? १७

قُلْ نَعَمْ وَ اَنْتُمْ دَاخِرُوْنَ ﴿۱۸﴾

आपण उत्तर द्या की, होय! होय!! आणि तुम्ही क्षुल्लक व्हाल. [५] १८

فَاِنَّمَا هِيَ زَجْرَةٌ وَّاحِدَةٌ فَاِذَا هُمْ يَنْظُرُوْنَ ﴿۱۹﴾

ती तर फक्त एक जोराची ललकार आहे [६] की, एकाएकी हे पाहू लागतील. [७] १९

१) म्हणजे आम्ही जी पृथ्वी, देवदूत आणि आकाशासारख्या वस्तू बनविल्या आहेत. ज्या आपल्याा भव्य आणि विस्तृततेच्या अनुषंगाने फारच विलक्षण आहेत. काय या लोकांची निर्मिती, आणि दुसऱ्यादा त्यांना जिवंत करणे, या वस्तुंच्या निमिर्ती पेक्षा, जास्त कडक आणि कठीण काम आहे? खचित्च नाही.
२) म्हणजे यांचे वडील ह. आदम ﷺ ला तर आम्ही मातीपासून निर्माण केले आहे. अर्थ हा आहे की, हा मनुष्य परलोकाच्या जीवनाला इतका अशक्य का समजतो? वास्तविक यांची निर्मिती, एक फारच क्षुल्लक आणि दुर्बल वस्तूंपासून झाली आहे. जेव्हा की बनविण्यात यांच्यापेक्षा जास्त शक्तीमान, महान आणि परीपूर्ण आणि चांगल्या वस्तुंना हे नाकारत नाही. (फत्हुल कदीर)
३) म्हणजे आपणाला तर परलोकाला नाकारणाऱ्यांचे आश्चर्य वाटत आहे. कीं, त्याची शक्यता आणि त्याच्या घडून येण्याची इतकी स्पष्ट प्रमाणे असून सुध्दा ते त्याला मान्यता देत नाही. आणि ते आपल्या कयामतच्या दाव्याची हंशी उडविडतात, कीं, हे कसे काय शक्य आहे?
४) म्हणजे ही त्यांची नेहमीची पध्दत आहे कीं, उपदेशाला मान्य करीत नाही, आणि जर कोणी स्पष्ट प्रमाण किंवा चमत्कार सादर केला जाईल, तर त्याची हंसी उडवितात, आणि त्याला जादू म्हणतात.
५) ज्याप्रमाणे दुसऱ्या ठिकाणी पण सांगितले, ''सर्व त्याच्यासमोर क्षुल्लक होऊन येतील.'' (सू.नमल-८७) ''जे लोक माझ्या उपासनेला नकार देतात, लवकरच ते क्षुल्लक आणि फजित होऊन, नरकाग्नीत दाखल होतील.'' (सू.मोमिन-६०)
६) म्हणजे ते अल्लाहच्या एकाच हुकूम आणि इसराफीलच्या एकाच फुंकेने (दुसरा सूर) कबरीतून जिवंत होऊन, निघून उभे राहतील.
७) म्हणजे यांच्या समोर कयामतची भयानक दृष्यें, आणि हशरच्या मैदानाची कठीणता असतील; ज्यांना ते पाहतील, सूर किंवा गर्जनेला (धमकी) 'जजरा' म्हटले आहे; कारण की याचा उद्देश्य फटकारणे आहे.

وَقَالُوْا يٰوَيْلَنَا هٰذَا يَوْمُ الدِّيْنِ ﴿٢٠﴾

आणि म्हणतील की, अरेरे आमचे दुर्भाग्य! हा तर निर्णयाचा दिवस आहे. (२०)

هٰذَا يَوْمُ الْفَصْلِ الَّذِيْ كُنْتُمْ بِهٖ تُكَذِّبُوْنَ ﴿٢١﴾

हाच फैसल्याचा दिवस आहे, ज्याला तुम्ही खोटे म्हणीत राहिला [१] (२१)

اُحْشُرُوا الَّذِيْنَ ظَلَمُوْا وَاَزْوَاجَهُمْ وَمَا كَانُوْا يَعْبُدُوْنَ ﴿٢٢﴾

जालीमांना, [२] आणि त्यांच्या सोबत्यांना, [३] आणि ज्यांची ज्यांची ते अल्लाहशिवाय उपासना करित होते, [४] (२२)

مِنْ دُوْنِ اللّٰهِ فَاهْدُوْهُمْ اِلٰى صِرَاطِ الْجَحِيْمِ ﴿٢٣﴾

(या सर्वांना गोळा करून) नरकाग्नीचा मार्ग दाखवून द्या. (२३)

وَقِفُوْهُمْ اِنَّهُمْ مَّسْئُوْلُوْنَ ﴿٢٤﴾

आणि यांना (जरा) थांबवून घ्या; [५] यासाठी की, त्यांना काही आवश्यक प्रश्न केले जाणार आहेत. (२४)

مَا لَكُمْ لَا تَنَاصَرُوْنَ ﴿٢٥﴾

काय कारण आहे की, तुम्ही (यावेळी) एक दुसऱ्याची मदत करीत नाहीत (२५)

بَلْ هُمُ الْيَوْمَ مُسْتَسْلِمُوْنَ ﴿٢٦﴾

किंबहुना ते (सर्वच्या सर्व) आज आज्ञाधारक बनून गेलेत. (२६)

وَاَقْبَلَ بَعْضُهُمْ عَلٰى بَعْضٍ يَّتَسَآءَلُوْنَ ﴿٢٧﴾

ते एकमेकांकडे वळून, प्रश्नोत्तरे करू लागतील (२७)

قَالُوْٓا اِنَّكُمْ كُنْتُمْ تَاْتُوْنَنَا عَنِ الْيَمِيْنِ ﴿٢٨﴾

म्हणतील कीं, तुम्ही तर आमच्या जवळ, आमच्या उजव्या बाजूने येत होतो. [६] (२८)

قَالُوْا بَلْ لَّمْ تَكُوْنُوْا مُؤْمِنِيْنَ ﴿٢٩﴾

ते उत्तर देतील, नाही! किंबहुना तुम्हीच ईमानवाले नव्हता. [७] (२९)

وَمَا كَانَ لَنَا عَلَيْكُمْ مِّنْ سُلْطٰنٍ ۚ بَلْ كُنْتُمْ قَوْمًا طٰغِيْنَ ﴿٣٠﴾

काही आमची तुमच्यावर बळजबरी तर नव्हती; किंबहुना, तुम्ही स्वत: शिरजोर लोक होता. [८] (३०)

१) 'वैल' चा शब्द गारद होण्याच्या वेळी बोलला जातो. म्हणजे शिक्षा पाहून, त्यांना आपले गारद होणे स्पष्ट दिसू लागेल. आणि याच्याने पश्चात्ताप व्यक्त करणे, आणि मान्य करण्याचा काही फायदा होणार नाही म्हणूनच त्यांच्या उत्तरांत देवदूत आणि ईमानवाले म्हणतील, हा तोच निर्णयाचा दिवस आहे, ज्याला तुम्ही मानत नव्हता. ही पण शक्यता आहे कीं, ते हे आपसांत एक दुसऱ्याला सांगतील.

२) म्हणजे ज्यांनी कुफ्र व शिर्क, आणि गुन्हे केलेत. हा अल्लाहतआला कडून हुकूम होईल.

३) याच्याने अभिप्रेत कुफ्र व शिर्क, आणि पैगंबरांना खोटे म्हणणाऱ्यांचे साथीदार, किंवा काहीजवळ जिन्न आणि शैतान आहेत. आणि काही म्हणतात कीं, त्या पत्न्या आहेत, ज्या कुफ्र आणि शिर्कमध्ये यांच्या बरोबर होत्या.

४) 'मा' सर्व साधारण आहे. सर्व उपास्य, मग त्या मूर्त्या असोत, किंवा अल्लाहचे सदाचरणी सेवक, सर्व त्यांच्या क्षुल्लक आणि फजित करण्यासाठी, गोळा केले जातील. तथापि सदाचारणी लोकांना तर, अल्लाह् जहन्नम पासून दुरच ठेवील. आणि दुसऱ्या उपास्यांना, त्यांच्याबरोबरच नरकाग्नी मध्ये टाकून देण्यांत येईल. कारण कीं त्यांनी पाहून घ्यावे कीं, हे कोणाला नफा किंवा नुकसान पोहोचवण्यावर समर्थ नाहीत.

५) हा हुकूम, नरकाग्नीत घेऊन जाण्यापूर्वी होईल. कारण कीं, हिशेबानंतरच ते नगकाग्नीत जातील.

६) याचा अर्थ आहे की, धर्म आणि सत्याच्या नावावर येत असत. म्हणजे असे भासवीत असत की, हाच खराधर्म आणि सत्य आहे. आणि काही जवळ अर्थ आहे, सर्व बाजुंनी येत असत, 'वश् शिमाल' महजूफ आहे. ज्याप्रमाणे शैतानाने सांगितले होते, '' मी त्यांच्या पुढून त्यांच्या मागून त्यांच्या उजवीकडून डावीकडून, सर्व बाजूंनी त्यांच्या जवळ येईल, आणि त्यांना बहकवील, (सू. आअराफ -१७)

७) पुढारी म्हणतील की, ईमान तुम्ही आपल्या मर्जीने आणले नाहीं. आणि आज आम्हास जबाबदार ठरवित आहात.

८) अधिनस्थ, आणि ते ज्यांच्या ते अधीन असतील, यांची ही आपसातील तकरार, कुरआन करीममध्यें कित्येक जागी, सांगण्यात आली आहे. यांचीही एक दुसऱ्याची निर्भत्सना, हशरच्या मैदानात पण होईल. आणि नगकाग्नीत गेल्यानंतर, नरकाग्नीत सुध्दा. कृपया पहावे सू.मोमिन- ४७/४८, सू. सबा- ३१/३२, सू.अहजाब- ६७/६८, सू. आअराफ- ३८/३९ वगैरे महावाक्ये.

فَحَقَّ عَلَيْنَا قَوْلُ رَبِّنَآ ۖ إِنَّا لَذَآئِقُونَ ﴿٣١﴾

आता तर आम्हासर्वांवर आमच्या पालनकर्त्याची गोष्ट सिध्द होऊन चुकली कीं आम्ही शिक्षेची गोडी चाखणार आहोत. ३१

فَأَغْوَيْنَٰكُمْ إِنَّا كُنَّا غَٰوِينَ ﴿٣٢﴾

तर, आम्ही तुम्हांस बहकविले, आम्ही स्वत: सुध्दातर बहकलेलेच होतो.[१] ३२

فَإِنَّهُمْ يَوْمَئِذٍ فِى ٱلْعَذَابِ مُشْتَرِكُونَ ﴿٣٣﴾

तर आता आजच्या दिवशी तर (सर्वच्या सर्व) शिक्षेत सामील आहोत[२] ३३

إِنَّا كَذَٰلِكَ نَفْعَلُ بِٱلْمُجْرِمِينَ ﴿٣٤﴾

आम्ही गुन्हेगारांबरोबर असेच (वर्तन) करीत असतो.[३] ३४

إِنَّهُمْ كَانُوٓا۟ إِذَا قِيلَ لَهُمْ لَآ إِلَٰهَ إِلَّا ٱللَّهُ يَسْتَكْبِرُونَ ﴿٣٥﴾

हे (लोक) असे आहेत की, जेव्हा त्यांना सांगण्यात येते की, अल्लाहच्या शिवाय अन्य कोणी उपास्य नाही; तेव्हा हे शिरजोरी करीत होते.[४] ३५

وَيَقُولُونَ أَئِنَّا لَتَارِكُوٓا۟ ءَالِهَتِنَا لِشَاعِرٍ مَّجْنُونٍۭ ﴿٣٦﴾

आणि म्हणत होते की, काय आम्ही आपल्या उपास्यांना, एका वेड्या कवीच्या सांगण्यावर सोडून द्यावे.[५] ३६

بَلْ جَآءَ بِٱلْحَقِّ وَصَدَّقَ ٱلْمُرْسَلِينَ ﴿٣٧﴾

(नाही! नाही!!) किंबहुना (पैगंबरांनी) तर खरा धर्म आणला आहे. आणि आम्ही सर्व पैगंबराना खरे जाणत आहोत.[६] ३७

إِنَّكُمْ لَذَآئِقُوا۟ ٱلْعَذَابِ ٱلْأَلِيمِ ﴿٣٨﴾

खचित्च तुम्ही दु:खदायक शिक्षेची गोडी चाखणार आहात ३८

وَمَا تُجْزَوْنَ إِلَّا مَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿٣٩﴾

तुम्हांला त्याचाच मोबदला दिला जाईल, जे तुम्ही करीत होता.[७] ३९

१) म्हणजे ज्या गोष्टीचे पहिले त्यांनी खंडन केले, की आमचा तुमच्यावर काय जोरा होता की, तुम्हास बहकविते. आता येथे त्यांना मान्य आहे की, होय, खरोखर आम्ही तुम्हांस बहकविले होते. परंतु ही मान्यता या तंबी बरोबर दिली की, आम्हाला याबाबतीत टिकेचे लक्ष्य बनवू नका, कारण की आम्ही स्वत: सुध्दा बहकलेलेच होतो; आम्ही तुम्हास पण, आपल्यासारखे बनवू इच्छिले; आणि तुम्ही सहजरित्या आमचा मार्ग स्वीकारला. ज्याप्रमाणे शैतान पण त्या दिवशी म्हणेल, ''माझा तुमच्यावर काही जोर तर नव्हताच, होय, परंतु मी तुम्हास बोलाविले, आणि तुम्ही माझे मान्य केले. आता तुम्ही माझ्यावर दोषारोप करु नका, किंबहुना आपल्या स्वत:चीच निर्भत्सना करा.'' (सू.इब्राहीम- २२)
२) यासाठी की त्यांचा अपराध पण सामाईक होता. शिर्क, गुन्हे, फिसाद, या सर्वांचे मिश्रण होते.
३) म्हणजे प्रत्येक प्रकारच्या गुन्हेगारांबरोबर, आमचा हाच मामला आहे आणि आता ते सर्व आमची शिक्षा भोगतील.
४) म्हणजे जगात, जेव्हा त्यांना सांगण्यात येत होते की, ज्याप्रमाणे मुसलमानांनी हा कलमा म्हणून, शिर्क आणि गुन्ह्यांपासून, तौबा करुन घेतली आहे; तुम्ही सुध्दा हा कलमा म्हणून घ्या. म्हणजे तुम्ही जगांत मुसलमानांच्या नाराजी आणि रागापासून वांचून जाल; आणि परलोकांत पण अल्लाहच्या शिक्षेत ग्रस्त व्हावे लागू नये. तर ते अहंकार करीत आणि इनकार करीत. नबी करीम ﷺ चा फर्मान आहे, ''मला या गोष्टीचा हुकूम देण्यात आला आहे की, मी त्यावेळेपर्यंत लोकांशी युध्द करावे, जोपर्यंत ते 'लाईलाहा इल्लल्लाह' ला मान्य करीत नाहीत. ज्याने हे मान्य करुन घेतले, त्याने आपल्या प्राणाचे आणि संपत्तीचे संरक्षण करुन घेतले. ''(मुत्तफक अलैहि)
५) म्हणजे त्यांनी नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला कवी आणि वेडा म्हटले आणि आपल्या आवाहनाला वेडेपणा आणि कुरआनाला काव्य ठरविले आणि म्हटले की, एका वेड्याच्या, वेडेपणावर आम्ही, आमच्या उपास्यांना का सोडून द्यावे? वास्तविक हा वेडेपणा नाही, शहाणपण होते; काव्य नाही, वास्तविकता होती. आणि या आवाहनाला अंगीकारण्यामध्ये त्यांची बर्बादी नव्हती; मुक्ती होती.
६) म्हणजे, तुम्ही आमच्या पैगंबराला, कवी आणि वेडा म्हणतात. जेव्हा की वस्तुस्थिती अशी आहे की, त्याने जे काही आणले आणि सादर करीत आहे, ते खरे आहे आणि तीच गोष्ट आहे, जी याच्यापूर्वी सर्व पैगंबर सुध्दा सादर करीत राहिले आहेत. काय हे काम, कोण्या वेड्या किंवा कोण्या कवीच्या कल्पना विलासाचा परिणाम होऊ शकतो?
७) हे नर्कवासियांना त्यावेळी सांगण्यात येईल, जेव्हा ते उभे राहून एक दुसऱ्याला विचारत असतील, आणि त्याच बरोबर स्पष्टीकरण करुन देण्यात येईल की, हा जुलूम नाही, किंबहुना खरा न्याय आहे, कारण हा सर्व तुमच्या कर्माचा मोबदला आहे.

| | |
|---|---|
| परंतु अल्लाहतआलाचे निस्सीम भक्त, (१) ४० | اِلَّا عِبَادَ اللّٰهِ الْمُخْلَصِيْنَ ﴿٤٠﴾ |
| त्यांच्याच करिता निश्चित केलेली अन्न संपत्ती आहे. ४१ | اُولٰٓئِكَ لَهُمْ رِزْقٌ مَّعْلُوْمٌ ﴿٤١﴾ |
| (प्रत्येक प्रकारचे) मेवे, आणि ते आदरणीय व सन्माननीय आहेत. ४२ | فَوَاكِهُ ۚ وَهُمْ مُّكْرَمُوْنَ ﴿٤٢﴾ |
| देणग्यांवाल्या स्वर्गांत, ४३ | فِيْ جَنّٰتِ النَّعِيْمِ ﴿٤٣﴾ |
| तक्त्यांवर, एक दुसऱ्याच्या समोर (बसलेले) असतील. ४४ | عَلٰى سُرُرٍ مُّتَقٰبِلِيْنَ ﴿٤٤﴾ |
| (यांच्यात) स्वच्छ मद्याचा पेला, फिरविला जात असेल. (२) ४५ | يُطَافُ عَلَيْهِمْ بِكَاْسٍ مِّنْ مَّعِيْنٍ ﴿٤٥﴾ |
| जे पांढरे शुभ्र आणि पिण्यात रूचकर असेल (३) ४६ | بَيْضَآءَ لَذَّةٍ لِّلشّٰرِبِيْنَ ﴿٤٦﴾ |
| न याच्यापासून डोके दुखेल, न त्याच्या पिण्याने ते बहकतील. (४) ४७ | لَا فِيْهَا غَوْلٌ وَّلَا هُمْ عَنْهَا يُنْزَفُوْنَ ﴿٤٧﴾ |
| आणि यांच्यासाठी खाली नजर राखणाऱ्या, मोठ्या मोठ्या डोळ्यांच्या (आप्सरा) असतील (५) ४८ | وَعِنْدَهُمْ قٰصِرٰتُ الطَّرْفِ عِيْنٌ ﴿٤٨﴾ |
| अशा जसे लपवून ठेवलेले अंडे. (६) ४९ | كَاَنَّهُنَّ بَيْضٌ مَّكْنُوْنٌ ﴿٤٩﴾ |
| (स्वर्गवासी) एक दुसऱ्याकडे वळून, विचारतील (७) ५० | فَاَقْبَلَ بَعْضُهُمْ عَلٰى بَعْضٍ يَّتَسَآءَلُوْنَ ﴿٥٠﴾ |
| यांच्यातून एक म्हणेन की माझा एक सोबती होता. ५१ | قَالَ قَآئِلٌ مِّنْهُمْ اِنِّيْ كَانَ لِيْ قَرِيْنٌ ﴿٥١﴾ |
| जो (मला) विचारीत असे की, काय तू, (कयामतच्या येण्याची) खात्री बाळगण्यांमधून आहेस. (८) ५२ | يَّقُوْلُ اَئِنَّكَ لَمِنَ الْمُصَدِّقِيْنَ ﴿٥٢﴾ |
| काय जेव्हा की आम्ही मरुन, माती आणि हाडे होऊन जाऊ, काय त्यावेळी आम्हाला मोबदला दिला जाईल. (९) ५३ | ءَاِذَا مِتْنَا وَكُنَّا تُرَابًا وَّعِظَامًا ءَاِنَّا لَمَدِيْنُوْنَ ﴿٥٣﴾ |
| (तो) म्हणेल काय तुम्ही इच्छितात की, (त्याला) डोकावून पाहून घ्यावे? (१०) ५४ | قَالَ هَلْ اَنْتُمْ مُّطَّلِعُوْنَ ﴿٥٤﴾ |

१) म्हणजे हे शिक्षेपासून सुरक्षित राहतील. त्यांच्या कोताईंपासून सुध्दा त्यांना क्षमा करुन टाकण्यात येईल, जर काही असेल; आणि एकेका पुण्याचा मोबदला त्यांना किती तरी पटींनी देण्यात येईल.

२) 'कास' मद्याने भरलेल्या प्यालाला, आणि 'कदह', खाली प्याल्याला म्हणतात. 'मअीन' चा अर्थ आहे, वाहता झरा. अर्थ हा आहे की, वाहत्या झऱ्याप्रमाणे, पेये नेहमी प्राप्त होत राहील.

३) जगामध्ये पेय, सर्वसाधारण रंगहीन असते. स्वर्गामध्ये, ज्याप्रमाणे ते स्वादिष्ट असेल, चांगल्या रंगाचे पण असेल.

४) म्हणजे जगांतील मद्याप्रमाणे यांच्यात, उलटी होणे, डोके दु:खी, निशाधुंदी आणि बहकण्याचा अंदेशा राहणार नाही.

५) मोठ मोठे डोळे सौंदर्याचे चिन्ह आहे. म्हणजे सुंदर डोळे असतील.

६) दुसरे भाषांतर आहे, लपविलेली अंडी, म्हणजे शहामृगाने, पंखांच्या खाली लपविलेली असावीत. ज्यामुळे ती अंडी, वारा आणि धुळीपासून सुरक्षित असावीत. असे म्हणतात की, शहामृगाची अंडी दिसावयाला फारच चांगल्या रंगाची असतात. जी पिवळसर पांढरी असतात. आणि असा रंग, रुपसौंदर्याच्या जगतात, सर्वांत उत्कृष्ट समजला जातो. या अनुषंगाने ही उपमा, फक्त गोरेपणात नाही, किंबहुना चांगल्या रंगात, व सौंदर्य आणि टवटीतपणात आहे.

७) स्वर्गवासी, स्वर्गांत, एक दुसऱ्या बरोबर बसून, जगातील घटनांची आठवण करतील, आणि एक दुसऱ्याला ऐकवतील.

८) म्हणजे ही गोष्ट तो, उपहास आणि थट्टा, म्हणून करीत असे . उद्देश्य त्याचा हा होता की, हे तर अशक्य आहे, काय असल्या अशक्य घटनांवर तू विश्वास ठेवतोस?

९) म्हणजे आम्हास जिवंत करून, आमचा हिशेब घेतला जाईल. आणि मग याच्याप्रमाणे मोबदला दिला जाईल?

१०) म्हणजे तो स्वर्गवासी आपल्या स्वर्गातल्या साथीदारास म्हणेन, काय तुला हे आवडेल, की, जरा नरकाग्नीत डोकावून पहावे, कदाचित् माझ्याशी या गोष्टी करणारा, तेथे दृष्टीस पडून जावा; की, तुम्हास सांगेन कीं हाच तो मनुष्य होता, जो या गोष्टी करीत होता.

| | |
|---|---|
| فَاطَّلَعَ فَرَاٰهُ فِيْ سَوَآءِ الْجَحِيْمِ ﴿٥٥﴾ | डोकावताच, त्याला नरकाग्नीच्या मधोमध जळतांना पाहील. ५५ |
| قَالَ تَاللّٰهِ اِنْ كِدْتَّ لَتُرْدِيْنِ ﴿٥٦﴾ | म्हणेल, अल्लाहची शपथ! तू जवळ जवळ मला बर्बादच करुन टाकले असते. ५६ |
| وَلَوْلَا نِعْمَةُ رَبِّيْ لَكُنْتُ مِنَ الْمُحْضَرِيْنَ ﴿٥٧﴾ | जर माझ्या पालनकर्त्याचा उपकार झाला नसता, तर मी पण नर्कात हजर केला गेलो असतो. [१] ५७ |
| اَفَمَا نَحْنُ بِمَيِّتِيْنَ ﴿٥٨﴾ | काय (हे बरोबर आहे) की, आम्ही मरणारच नाही? [२] ५८ |
| اِلَّا مَوْتَتَنَا الْاُوْلٰى وَمَا نَحْنُ بِمُعَذَّبِيْنَ ﴿٥٩﴾ | शिवाय पहिला एका मृत्यूनंतर; [३] आणि न आम्हास शिक्षा केली जाईल. ५९ |
| اِنَّ هٰذَا لَهُوَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ﴿٦٠﴾ | मग, (उघड गोष्ट आहे की) हे तर फारच मोठे साफल्य आहे. [४] ६० |
| لِمِثْلِ هٰذَا فَلْيَعْمَلِ الْعٰمِلُوْنَ ﴿٦١﴾ | अशा (साफल्या) साठी, कर्म करणाऱ्यांना, कर्म करावयास पाहिजे [५] ६१ |
| اَذٰلِكَ خَيْرٌ نُّزُلًا اَمْ شَجَرَةُ الزَّقُّوْمِ ﴿٦٢﴾ | काय हा पाहुणचार चांगला आहे, किंवा जक्कूम (म्हणजे निवडुंगाचे झाड)? [६] ६२ |
| اِنَّا جَعَلْنٰهَا فِتْنَةً لِّلظّٰلِمِيْنَ ﴿٦٣﴾ | ज्याला आम्ही जुलमी लोकांसाठी, कडक शिक्षा बनवून ठेवले आहे. [७] ६३ |

१) म्हणजे डोकावून पाहिल्यानंतर, त्यांच्या नरकाग्नीच्या मध्यें, तो मनुष्य दिसून येईल आणि त्याला हा स्वर्गवासी म्हणेन कीं, मला पण तू बहकवून, बर्बादीत टाकणार होतास. हा तर माझ्यावर अल्लाहचा उपकार झाला, नाही तर आज मी पण तुझ्या बरोबर नरकाग्नीत असतो.
२) नर्कवासियांचा परिणाम बघून, स्वर्गवाशाच्या मनांत, ही भावना निर्माण होईल, आम्हास जे स्वर्गाचे जीवन, आणि त्याच्या देणग्या मिळाल्या आहेत, काय या नेहमी साठी नाहीत? आणि आता आम्हास मृत्यू येणार नाही? हे म्हणणे जाणून घेण्यासाठी आहे. म्हणजे आता जीवन कायमचे आहे. स्वर्गवासी नेहमी स्वर्गांत, आणि नर्कवासी नेहमी नर्कांत राहतील. न त्यांना मृत्यू येईल, की नरकाग्नीच्या शिक्षेपासून मुक्त व्हावे. आणि न आम्ही स्वर्गाच्या देणग्यांपासून वंचित् व्हावे. ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते की मृत्यू एका मेंढ्याच्या रूपांत, स्वर्ग आणि नरकाच्या दर्म्यान आणून जबह करून टाकला जाईल, कीं आता कोणाला मृत्यू येणार नाही.
३) जो जगांत येऊन चुकला, आता आमच्या करता न मृत्यू आहे न शिक्षा
४) यासाठी की नरकाग्नी पासून वांचून जाण्यासाठी, आणि स्वर्गाच्या देणग्यांना पात्र ठरून जाण्याहून जास्त, आणखी काय साफल्य असेल?
५) म्हणजे या सारखी देणगी, आणि या सारख्या मोठ्या कृपेसाठीच कष्ट करणाऱ्यांना, कष्ट करावयांस पाहिजे. कारण हाच सर्वांत जास्त फायदा देणारा, व्यापार आहे. न की इहलोकासाठी, जो तात्कालिक आहे. आणि तोट्याचा व्यवहार आहे.
६) 'जक्कूम' निवडुंगा सारखा आहे. तजक्कुम ज्याचा अर्थ दुर्गंधयुक्त आणि काटेरी वस्तुला गिळण्याचा आहे. ह्या वृक्षाचे फळ खाणे सुध्दा, नर्कवासियांकरिता फारच असह्य होईल कारण हे फारच दुर्गंधीयुक्त, कडू आणि फारच काटेदार असेल. काही म्हणतात कीं हे जगाच्या वृक्षांमधून आहे आणि अरबांमध्ये परिचित आहे. हा कुतरुब नावाचा वृक्ष आहे, जो मक्का मुकर्रमाच्या भूमीत (तहामा), आढळून येतो. आणि काही म्हणतात की हा काही ऐहिक वृक्ष नाही. जगातील लोकांसाठी हा अपरिचित आहे. (फत्हुल कदीर) परंतु पहिले म्हणणे जास्त बरोबर आहे, आणि हा तोच वृक्ष आहे. ज्याला उर्दूमध्ये, सेंढ किंवा थुहर म्हणतात.
७) कसोटी या साठी की, याचे फळ खाणे, स्वत:च एक मोठी कसोटी आहे. काहींनी याला या अनुषंगाने कसोटी म्हटले कीं, त्यांनी याच्या अस्तित्वाला नाकारले; की जेव्हा नरकाग्नीमध्ये चोहीकडे आगच आग असेल, तर तेथे वृक्ष कसा काय टिकू शकतो? येथे जुलमींनी अभिप्रेत, नरकाग्नीवाले आहेत. ज्याच्यावर नरकाग्नी आवश्यक ठरविली जाईल.

اِنَّهَا شَجَرَةٌ تَخْرُجُ فِيْٓ اَصْلِ الْجَحِيْمِ ﴿٦٤﴾
जो वृक्ष नरकाग्नीच्या बुडातून उगवितो.[१] ६४

طَلْعُهَا كَاَنَّهٗ رُءُوْسُ الشَّيٰطِيْنِ ﴿٦٥﴾
ज्याच्या फळांचे घौस, शैतानांच्या डोक्यांसारखे असतात.[२] ६५

فَاِنَّهُمْ لَاٰكِلُوْنَ مِنْهَا فَمَالِـُٔوْنَ مِنْهَا الْبُطُوْنَ ﴿٦٦﴾
(नर्कवासी) याच वृक्षाला खातील, आणि यानेच पोट भरतील.[३] ६६

ثُمَّ اِنَّ لَهُمْ عَلَيْهَا لَشَوْبًا مِّنْ حَمِيْمٍ ﴿٦٧﴾
मग याच्यावर उकळत्या पाण्याचे मिश्रण असेल.[४] ६७

ثُمَّ اِنَّ مَرْجِعَهُمْ لَاِلَى الْجَحِيْمِ ﴿٦٨﴾
मग या सर्वांचे परतणे, नर्काच्या (आगीच्या ढीगा) कडे होईल.[५] ६८

اِنَّهُمْ اَلْفَوْا اٰبَآءَهُمْ ضَآلِّيْنَ ﴿٦٩﴾
लक्षात ठेवा की, त्यांनी आपल्या वाड वडिलांना बहकलेले पावले. ६९

فَهُمْ عَلٰٓى اٰثٰرِهِمْ يُهْرَعُوْنَ ﴿٧٠﴾
आणि हे त्यांच्याच पाऊलखुणांवर लगबग लगबग चालत राहिले.[६] ७०

وَلَقَدْ ضَلَّ قَبْلَهُمْ اَكْثَرُ الْاَوَّلِيْنَ ﴿٧١﴾
यांच्या पूर्वीसुध्दा पुष्कळसे पूर्वीचे लोक बहकून चुकले आहेत.[७] ७१

وَلَقَدْ اَرْسَلْنَا فِيْهِمْ مُّنْذِرِيْنَ ﴿٧٢﴾
ज्यांच्यात आम्ही सावध करणारे (पैगंबर) पाठविले होते.[८] ७२

فَانْظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُنْذَرِيْنَ ﴿٧٣﴾
आता तू पहा की, ज्यांना धमकविण्यात आले होते, त्यांचा परिणाम कसा काय झाला. ७३

اِلَّا عِبَادَ اللّٰهِ الْمُخْلَصِيْنَ ﴿٧٤﴾
अल्लाहच्या निस्सीम भक्तांशिवाय[९] ७४

وَلَقَدْ نَادٰىنَا نُوْحٌ فَلَنِعْمَ الْمُجِيْبُوْنَ ﴿٧٥﴾
आणि नूहने पण आम्हास हांक मारली होती तर (पाहून घ्या) कीं आम्ही किती चांगले प्रार्थना कबूल करणारे आहोत.[१०] ७५

१) म्हणजे याचे मूळ, नरकाग्नीच्या खोलीत असेल, तथापि त्याच्या फांद्या सर्वदूर पसरलेल्या असतील.

२) याला वाईट पणात, शैतानांच्या डोक्यांची उपमा दिली आहे. ज्याप्रमाणे चांगल्या गोष्टींच्या बाबतीत म्हणतात जणू की, तो देवदूत आहे.

३) हे त्यांना फारच अनिच्छेने खावे लागेल. ज्याने उघड आहे कीं, पोट तर जड होतील

४) म्हणजे खाल्यानंतर त्यांना पाणी प्यावेसे वाटेल तर उकळते गरम पाणी त्यांना देण्यात येईल. ज्यांच्या पिण्याने त्यांच्या आतड्या गळून पडतील. (सू.मोहम्मद- १५)

५) म्हणजे 'जक्कूम' खाल्यानंतर आणि गरम पणी पाल्यानंतर त्यांना दुसऱ्यादा नरकाग्नीत फेकून देण्यात येईल.

६) हे नरकाग्नीच्या चर्चित शिक्षेचे कारण आहे की, आपल्या वाडवडिलांना बहकलेले पावून सुध्दा हे त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून चालत राहिले. आणि प्रमाण आणि तर्कच्या मुकाबल्यात, अंधानुकरणाला, अंगी कारून ठेवले. 'इह्राअ' 'इसराअ' च्या अर्थात आहे म्हणजे धावणे, आणि फारच आवडीने, आणि वळून कोण्या गोष्टीला धरणे, आणि तिचा अंगिकार करणे.

७) म्हणजे हेच बहकले नाहीत, यांच्या पूर्वीचे लोकसुध्दा बहुतेक, बहकलेल्या मार्गावरच चालणारे होते.

८) म्हणजे त्यांच्या पूर्वीच्या लोकांमध्ये. त्यांनी सत्याचा संदेश पोहचवला आणि मान्य न करण्याच्या स्वरूपात, त्यांना अल्लाहच्या शिक्षेने भिवविले; परंतु त्यांच्यावर काही परीणाम झाला नाही, परिणामी त्यांना नष्ट करून टाकले गेले. जसा की पुढील महावाक्यात त्यांच्या बोध घेण्यासारख्या, परिणामाकडे इशारा केला.

९) म्हणजे बोध घेण्यासारख्या परिणामापासून फक्त ते सुरक्षित राहिले, ज्यांना अल्लाहतआलाने ईमान आणि एकेश्वरवादाची सुबुध्दी बहाल करून वाचवून घेतले 'मुखलसीन,' ते लोक, जे शिक्षेपासून वाचून राहिले. 'मुन्जरीन' (नष्ट होणाऱ्या लोकां) च्या, एकत्रित उल्लेखानंतर, आता काही 'मुन्जिरीन' (पैगंबराचा) उल्लेख केला जात आहे.

१०) म्हणजे साडे नऊशे वर्षाच्या प्रचारानंतर सुध्दा, बहुतेक लोकांनी, त्यांना खोटेच ठरवले, आणि त्यांना वाटू लागले की, त्यांच्या ईमान आणण्याची काही आशा नाही तेव्हा आपल्या पालनकर्त्याला हाक मारली, ''या अल्लाह मी हरलो! माझी मदत कर!!'' (सू.कमर-१०) म्हणून आम्ही नूहची दुआ कबूल केली आणि त्यांच्या लोकांना तुफान पाठवून नष्ट करून टाकले.

| | |
|---|---|
| وَنَجَّيْنٰهُ وَاَهْلَهٗ مِنَ الْكَرْبِ الْعَظِيْمِ ﴿٧٦﴾ | **आम्ही त्याला आणि त्यांच्या अधीनस्थांना, या जबरदस्त (१) संकटातून वाचवून घेतले ७६** |
| وَجَعَلْنَا ذُرِّيَّتَهٗ هُمُ الْبٰقِيْنَ ﴿٧٧﴾ | **त्याच्या संततीला आम्ही, बाकी राहणारी बनवून टाकली. (२) ७७** |
| وَتَرَكْنَا عَلَيْهِ فِي الْاٰخِرِيْنَ ﴿٧٨﴾ | **आणि आम्ही त्याचे सुस्मरण, (त्याच्या) मागे येणाऱ्यांमध्ये बाकी ठेवले. (३) ७८** |
| سَلٰمٌ عَلٰى نُوْحٍ فِي الْعٰلَمِيْنَ ﴿٧٩﴾ | **नूह (अ.) वर आलम दुनियेत सलाम असो! ७९** |
| اِنَّا كَذٰلِكَ نَجْزِي الْمُحْسِنِيْنَ ﴿٨٠﴾ | **परोपकार करणाऱ्यांस आम्ही असेच मोबदले देत असतो. (४) ८०** |
| اِنَّهٗ مِنْ عِبَادِنَا الْمُؤْمِنِيْنَ ﴿٨١﴾ | **तो आमच्या ईमानवाल्या भक्तांमधून होता ८१** |
| ثُمَّ اَغْرَقْنَا الْاٰخَرِيْنَ ﴿٨٢﴾ | **मग आम्ही बाकीच्या सर्व लोकांना बुडवून टाकले ८२** |
| وَاِنَّ مِنْ شِيْعَتِهٖ لَاِبْرٰهِيْمَ ﴿٨٣﴾ | **आणि नूहचे आज्ञापालन करणाऱ्यांमधूनच, इब्राहीम पण होते. (५) ८३** |
| اِذْ جَآءَ رَبَّهٗ بِقَلْبٍ سَلِيْمٍ ﴿٨٤﴾ | **जेव्हा कीं त्यांनी आपल्या पालनकर्त्याजवळ, निर्मळ मन आणले, ८४** |
| اِذْ قَالَ لِاَبِيْهِ وَقَوْمِهٖ مَاذَا تَعْبُدُوْنَ ﴿٨٥﴾ | **त्यांनी आपले वडील, आणि आपल्या लोकांना विचारले तुम्ही कोणाची पुजा करीत आहांत ? ८५** |
| اَئِفْكًا اٰلِهَةً دُوْنَ اللّٰهِ تُرِيْدُوْنَ ﴿٨٦﴾ | **काय तुम्ही आपल्या खोट्या नाट्या समजुतीने, अल्लाहच्या शिवाय दुसऱ्यांचे उपासक बनत आहात? (६) ८६** |
| فَمَا ظَنُّكُمْ بِرَبِّ الْعٰلَمِيْنَ ﴿٨٧﴾ | **तर हे तर सांगा की, तुम्ही सकल जगाच्या पालनकर्त्याला काय समजून ठेवले आहेत? (७) ८७** |

१) 'अहल' ने अभिप्रेत ह. नूह عليه السلام वर ईमान आणणारे लोक आहेत. ज्यात त्यांच्या घरातील व्यक्ती पण आहेत, जे ईमानवाले होते. काही भाष्यकारांनी यांची संख्या ८० सांगितली आहे. यांच्यात आपली पत्नी आणि एक मुलगा, शामील नाही. जे ईमानवाले नव्हते ते पण वादळांत बुडून गेले. करबे अजीम, (जबरदस्त संकट) ने अभिप्रेत तोंच जलप्रलय, ज्यात हे लोक बुडून गेलेत.

२) बहुतेक भाष्यकारांच्या म्हणण्याप्रमाणे, ह. नूह. عليه السلام ला, तीन मुलगे होते. हाम, साम, याफिस. यांच्याचपासून नंतरचा मानवी वंश चालला. याच करीता, ह. नूह عليه السلام ला. द्धितीय आदम (मनु सानी) पण म्हटले जाते. म्हणजे आदम प्रमाणे, आदम नंतर हे दुसरे मानवाचे पितामह आहेत. सामच्या वंशातून अरब, इराण, रूम, आणि यहूदी व ख्रिस्ती आहेत. हाम च्या वंशातून सुदान, (पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत) म्हणजे सिंध, हिंदुस्थान, नोब जन्ज, हबशा, किब्त, जन्ज बर्बर, वगैरे आहेत. आणि याफिस्च्या वंशातून सकालेबा तुर्क, खजर, आणि याजुज व माजुज वगैरे आहेत. (फत्हुल कदीर) वल्लाहु अअ्लम!

३) म्हणजे कयामत पर्यंत येणाऱ्या ईमानवाल्यांमध्ये, आम्ही ह. नूह عليه السلام चे सुस्मरण, बाकी ठेवलेआहे; आणि ते सर्व नूह عليه السلام वर सलाम पाठवतात. आणि पाठवत राहतील.

४) म्हणजे ज्याप्रमाणे नूह عليه السلام ची प्रार्थना मान्य करून, त्यांच्या संततीला, बाकी ठेऊन, आणि (त्यांच्या) मागल्यात त्यांचे सुस्मरण बाकी ठेवून, आम्ही नूह عليه السلام ला प्रतिष्ठा आणि मानसन्मान बहाल केला अशाच प्रकारे जो पण आपल्या म्हणण्यात, आणि करण्यात प्रांजल आणि या बाबतीत पक्का आणि प्रसिध्द असेल, त्याच्या बरोबर आम्ही असाच मामला करू.

५) 'शियआ' चा अर्थ गट आणि अनुयायाचा आहे. म्हणजे ह. इब्राहीम عليه السلام पण याच धर्मावाले एकेश्वरवादाच्या याच गटाचे आहेत. ज्यांना ह.नूह عليه السلام प्रमाणेच, अल्लाहकडे वळण्याची विशेष सुबुध्दी, नशीबी आली.

६) म्हणजे आपल्याकडूनच खोटे रचून की, हे उपास्य आहेत. तुम्ही अल्लाहला सोडून यांची उपासना करतात, वास्तविक पाहता हे दगड आणि मूर्त्या आहेत.

७) म्हणजे एवढे निंदनीय कृत्य करून सुध्दा, काय तो तुमच्या वर अप्रसन्न होणार नाही, आणि तुम्हास शिक्षा करणार नाही?

فَنَظَرَ نَظْرَةً فِي النُّجُومِ ۝٨٨

**आता इब्राहीमने एक दृष्टी ताऱ्यांवर टाकली.** (८८)

فَقَالَ إِنِّي سَقِيمٌ ۝٨٩

**आणि म्हटले मी तर आजारी आहे.**[१] (८९)

فَتَوَلَّوْا عَنْهُ مُدْبِرِينَ ۝٩٠

**यावर ते सर्व त्यांच्याकडून तोंड फिरवून परत चालले गेले.** (९०)

فَرَاغَ إِلَىٰ آلِهَتِهِمْ فَقَالَ أَلَا تَأْكُلُونَ ۝٩١

**आपण (गुपचूप) त्यांच्या उपास्यांकडे गेले आणि म्हणाले तुम्ही खात का नाहीत.**[२] (९१)

مَا لَكُمْ لَا تَنطِقُونَ ۝٩٢

**तुम्हास काय झाले की बोलत सुध्दा नाहीत.** (९२)

فَرَاغَ عَلَيْهِمْ ضَرْبًا بِالْيَمِينِ ۝٩٣

**मग तर (पूर्ण ताकदी निशी) उजव्या हाताने त्यांच्या मारण्यावर तुटून पडले.**[३] (९३)

فَأَقْبَلُوا إِلَيْهِ يَزِفُّونَ ۝٩٤

**(मूर्तीपुजक) ते धावत पळत आपल्याकडे आले.**[४] (९४)

قَالَ أَتَعْبُدُونَ مَا تَنْحِتُونَ ۝٩٥

**तेव्हा आपण (इब्राहीम अ.) सांगितले तुम्ही अशांची पुजाअर्चा करीतात, ज्यांना तुम्ही स्वत:च कोरून बनविता.** (९५)

وَاللَّهُ خَلَقَكُمْ وَمَا تَعْمَلُونَ ۝٩٦

**वास्तविक तुम्हास आणि तुमच्या बनविलेल्या वस्तुंना अल्लाह्नेच निर्माण केले आहे.**[५] (९६)

१) आकाशाकडे चिंतन आणि मनन करण्यासाठी पाहिले; जसे की काही लोक असे करतात. किंवा आपल्या समाजाच्या लोकांना, गोंधळात टाकण्यासाठी असे केले. जे असे मानत होते, ताऱ्यांचे आपआपल्या कक्षेत फिरणे, जगांत जे काही घडत आहे याला परीणामकारक आहे. ही घटना त्या वेळची आहे, की जेव्हा त्यांच्या समाजाचा तो दिवस आला, ज्याला ते बाहेर जाऊन ईद म्हणून, आणि सामाजिक सण म्हणून साजरा करीत असत. समाजाने ह. इब्राहिम عليه السلام ला.पण बरोबर चालण्याचे आमंत्रण दिले. परंतु इब्राहीम عليه السلام एकांत आणि संधीच्या शोधांत होते. कीं त्यांच्या मूर्तींचा विध्वंस केला जाऊ शकावा. म्हणून त्यांनी ही संधी योग्य जाणली कीं, उद्या मेळाव्यांत सर्व लोक बाहेर निघून जातील. तेव्हा मी आपली योजना कार्यान्वयीत करून टाकील. आणि सांगून टाकले कीं, मी आजारी आहे; किंवा आकाशांतील ग्रहताऱ्यांची चाल दाखवत आहे की, मी आजारी पडणार आहे. ही गोष्ट निव्वळ खोटी तर नव्हती, प्रत्येक मनुष्य, काही ना काही आजारीच असतो. याशिवाय त्यांच्या समाजाचे शिर्क, ह. इब्राहीम عليه السلام च्या मनाला टोचणी करणारा एक रोग होता. ज्याला पाहून ते मनांत दु:खी होत असत. अशा प्रकारे ह. इब्राहीम عليه السلام नी आपली असमर्थता जाहीर केली. जसा कीं, याचा आवश्यक खुलासा सू. अंबिया आ. ६३ मध्ये येऊन चुकला आहे.

२) म्हणजे ज्या मिठाया त्यांना चढविलेल्या तेथे पडल्या होत्या ती त्यांना खाण्याकरीता पुढे केली. जी उघड गोष्ट आहे कीं त्यांनी त्या खाल्ल्या नव्हत्या; किंबहुना त्या उत्तर देण्याला सुध्दा समर्थ नव्हत्या म्हणून उत्तर पण दिले नाही.

३) 'राग' चा अर्थ आहे त्यांच्याकडे ते वळले. 'जर्बुनबिल यमीन' अर्थ आहे, त्यांना जोरजोरांत मारून तोडून टाकणे.

४) 'यजिफ्फून' पळत पळत आले. म्हणजे जेव्हा मेळाव्यातून परत आले, तेव्हा पाहिले कीं, त्यांचे उपास्य, तुटून फुटून पडले आहेत, तेव्हा लगेच त्यांचे लक्ष्य इब्राहीमकडे गेले कीं, हे काम त्यानेच केले असावे जसा कीं, सू.अंबियामध्ये तपशील येऊन चुकला आहे. म्हणून त्यांना पकडून जनतेच्या न्यायालयात घेऊन आले. तेथे ह. इब्राहीम عليه السلام ला. या गोष्टीची संधी मिळून गेली कीं, त्यांनी त्यांच्यावर त्याची मूर्खता, आणि त्यांच्या उपास्यांची विवशता, स्पष्ट करून द्यावी.

५) म्हणजे ज्या मूर्त्या आणि चित्र, ज्यांना तुम्ही आपल्या हातांनी बनवतात, आणि त्यांना उपास्य समजतात. किंवा तुमचे संपूर्ण कर्म, जे पण तुम्ही करीत आहांत, त्यांचा निर्माणकर्ता पण अल्लाह् आहे. याच्याने स्पष्ट होते कीं, सेवकांच्या कृत्याचा निर्माता अल्लाह्च आहे. जशी की, अहले सुन्नतची धारणा आहे.

قَالُوا ابْنُوْا لَهٗ بُنْيَانًا فَاَلْقُوْهُ فِى الْجَحِيْمِ ﴿٩٧﴾

**ते म्हणू लागले, याच्याकरिता एक अग्नीगृह बनवा; आणि या धगधगीत आगीत याला टाकून द्या. (९७)**

فَاَرَادُوْا بِهٖ كَيْدًا فَجَعَلْنٰهُمُ الْاَسْفَلِيْنَ ﴿٩٨﴾

**त्यांनी तर इब्राहीमाबरोबर डाव करू इच्छिला. परंतु आम्ही त्यांनाच जेरीस आणले.[१] (९८)**

وَقَالَ اِنِّىْ ذَاهِبٌ اِلٰى رَبِّىْ سَيَهْدِيْنِ ﴿٩٩﴾

**आणि इब्राहिमाने म्हटले मी स्वदेश त्याग करून आपल्या पालनकर्त्याकडे जाणार[२] आहे. तो जरूर मला मार्गदर्शन करील. (९९)**

رَبِّ هَبْ لِىْ مِنَ الصّٰلِحِيْنَ ﴿١٠٠﴾

**हे माझ्या पालनकर्त्या! मला सच्छील संतती प्रदान कर. (१००)**

فَبَشَّرْنٰهُ بِغُلٰمٍ حَلِيْمٍ ﴿١٠١﴾

**तेव्हाआम्ही त्याला एका सौम्यवृत्तीच्या मुलाची खुषखबर दिली.[३] (१०१)**

فَلَمَّا بَلَغَ مَعَهُ السَّعْىَ قَالَ يٰبُنَىَّ اِنِّىْ اَرٰى فِى الْمَنَامِ اَنِّىْ اَذْبَحُكَ فَانْظُرْ مَاذَا تَرٰى ؕ قَالَ يٰاَبَتِ افْعَلْ مَا تُؤْمَرُ ۫ سَتَجِدُنِىْ اِنْ شَآءَ اللّٰهُ مِنَ الصّٰبِرِيْنَ ﴿١٠٢﴾

**मग जेव्हा मुलगा, एवढ्या वयाला पोहचला कीं, त्यांच्याबरोबर चालावे फिरावे, [४] तेव्हा इब्राहीमने म्हटले, माझ्या प्रिय मुला! मी स्वप्नांत स्वत:ला तुला जबह करतांना पाहत आहे; आता तू सांग की तुझे काय मत आहे? [५] मुलाने उत्तर दिले की, हे पित्या! जो हुकूम दिला गेला आहे, त्याला बजवा, इन्शा अल्लाह्! आपण मला सहनशीलच पावाल. (१०२)**

فَلَمَّآ اَسْلَمَا وَتَلَّهٗ لِلْجَبِيْنِ ﴿١٠٣﴾ۚ

**मग जेव्हा उभयंता, अधिन होऊन गेले आणि (बापाने पुत्राला) कपाळे वाटे पछाडले[६] (१०३)**

وَنَادَيْنٰهُ اَنْ يّٰاِبْرٰهِيْمُ ﴿١٠٤﴾ۙ

**तेव्हा आम्ही आवाज दिला की, हे इब्राहीम! (१०४)**

قَدْ صَدَّقْتَ الرُّءْيَا ۚ اِنَّا كَذٰلِكَ نَجْزِى الْمُحْسِنِيْنَ ﴿١٠٥﴾

**खचित्च तूआपल्या स्वप्नाला खरे करून दाखविले [७] नि:संशय सुकृत्य करणारास आम्ही असाच मोबदला देत असतो. (१०५)**

१) म्हणजे आगीला बाग बनवून त्यांच्या डावपेचाला अयशस्वी करून टाकले. तर पवित्र आहे ते व्यक्तित्व जे आपल्या सेवकांची मदत करते. आणि कसोटीला बहाल करण्यात, आणि वाईटाला भलाईत बदलून देते.

२) ह. इब्राहिम عليه السلام ची ही घटना बाबिल(इराक) मध्ये घडून आली. सरशेवटीं, येथून स्वदेश त्याग केला आणि सीरियाला चालले गेले . आणि तेथे जाऊन संततीसाठी प्रार्थना केली. (फत्हुल कदीर)

३) 'हलीम' म्हणून इशारा करून दिला कीं मुलगा मोठा होऊन सौम्य आणि सहनशील प्रवृत्तीचा होईल.

४) म्हणजे धावपळ करण्याच्या योग्यतेचा होऊन गेला. किंवा तारूण्याच्या जवळपास पोहचला. काही म्हणतात कीं यावेळेस हा मुलगा १३ वर्षाचा होता.

५) पैगंबराचे स्वप्न वह्य आणि अल्लाह्चा हुकूमच असतो. ज्यावर अमंल बजावणी करणे आवश्यक असते. पुत्राशी सल्लामसलतीचा उद्देश्य हे ठाऊक करून घेणे होते कीं, पुत्र पण अल्लाह्च्या हुकूमाच्या अमंलबजावणीस कुठपर्यंत तयार आहे?

६) प्रत्येक माणसाच्या चेहऱ्यावर दोन कपाळे (उजवीकडे आणि डावीकडे) असतात. आणि दरम्यान (मुख्य) कपाळ (जब्हता) म्हणून 'लिल्‌जबीन' चे जास्त बरोबर भाषांतर ''करवटीवर'' आहे. म्हणजे अशा प्रकारे कुशीवर झोपवून दिले, ज्याप्रमाणे जनावराला जबह् करते वेळी काब्याकडे तोंड करून कुशीवर झोपविले जाते. ''कपाळ किंवा चेहऱ्यावर झोपविण्याचे'' भाषांतर यासाठी करण्यात येते की, सुप्रसिध्द आहे, ह. इस्माईल عليه السلام नी इच्छा व्यक्त केली की, त्यांना अशाप्रकारे झोपविण्यात यावे की, चेहरा समोर न रहावा. ज्यामुळे प्रीती आणि वात्सल्याची भावना, अल्लाह्च्या हुकूमावर प्रबळ होण्याची शक्यता न रहावी.

७) म्हणजे मनाच्या पक्क्या इराद्यांने मुलाला जबह करण्यासाठी जमिनीवर झोपवून देण्यानेच तू आपले स्वप्न खरे करून दाखविले आहे. कारण की, याच्याने स्पष्ट होऊन गेले की, अल्लाहच्या हुकूमाच्या तुलनेत तुला कोणतीही गोष्ट प्रिय नाही. येथे पावेतो की एकुलता एक पुत्र सुद्धा.

إِنَّ هَٰذَا لَهُوَ الْبَلَٰٓؤُا الْمُبِينُ ۝١٠٦
वास्तविक पाहता ही खुली परीक्षा होती. [1] (१०६)

وَفَدَيْنَٰهُ بِذِبْحٍ عَظِيمٍ ۝١٠٧
आणि आम्ही एक मोठा जबीहा, त्याच्या प्राणमुल्यांत देऊन दिला [2] (१०७)

وَتَرَكْنَا عَلَيْهِ فِى الْـَٔاخِرِينَ ۝١٠٨
आणि आम्ही त्यांचे सुस्मरण, मागे येणाऱ्यात बाकी ठेवले. (१०८)

سَلَٰمٌ عَلَىٰٓ إِبْرَٰهِيمَ ۝١٠٩
इब्राहीमावर सलाम असो! (१०९)

كَذَٰلِكَ نَجْزِى الْمُحْسِنِينَ ۝١١٠
आम्ही सुकृत्य करणाऱ्यांना असाच बदला देत असतो. (११०)

إِنَّهُۥ مِنْ عِبَادِنَا الْمُؤْمِنِينَ ۝١١١
नि:संशय, तो आमच्या ईमानदार सेवकांमधून होता. (१११)

وَبَشَّرْنَٰهُ بِإِسْحَٰقَ نَبِيًّا مِّنَ الصَّٰلِحِينَ ۝١١٢
आणि आम्ही त्याला, इस्हाक पैगंबराची शुभसूचना दिली, जो सदाचरणी लोकांमधून होईल. [3] (११२)

وَبَٰرَكْنَا عَلَيْهِ وَعَلَىٰٓ إِسْحَٰقَ ۚ وَمِن ذُرِّيَّتِهِمَا مُحْسِنٌ وَظَالِمٌ لِّنَفْسِهِۦ مُبِينٌ ۝١١٣
आणि आम्ही इब्राहीम व इस्हाकवर आपले आशीर्वाद उतारल्या. [4] आणि या दोघांच्या संततीत, काही तर सुकृत्ये करणारे आहेत. आणि काही आपल्या जिवांवर निव्वळ जुलूम करणारे आहेत. [5] (११३)

وَلَقَدْ مَنَنَّا عَلَىٰ مُوسَىٰ وَهَٰرُونَ ۝١١٤
खचित्च आम्ही मूसा आणि हारूनवर मोठा उपकार केला [6] (११४)

وَنَجَّيْنَٰهُمَا وَقَوْمَهُمَا مِنَ الْكَرْبِ الْعَظِيمِ ۝١١٥
आणि त्यांना आणि त्यांच्या लोकांना मोठ्या दु:खद यातनेपासून सुटका करून दिली. [7] (११५)

وَنَصَرْنَٰهُمْ فَكَانُوا۟ هُمُ الْغَٰلِبِينَ ۝١١٦
आणि त्यांची मदत करून त्यांनाच वरचढ करून दिले (११६)

وَءَاتَيْنَٰهُمَا الْكِتَٰبَ الْمُسْتَبِينَ ۝١١٧
आणि आम्ही त्यांना (स्पष्ट आणि) तेजपुंज पुस्तक दिले (११७)

وَهَدَيْنَٰهُمَا الصِّرَٰطَ الْمُسْتَقِيمَ ۝١١٨
आणि त्यांना सरळमार्गावर कायम ठेवले (११८)

१) म्हणजे प्रिय पुत्राला जबह करण्याचा हुकूम, ही एक मोठी (कठोर) कसोटी होती, ज्यात तू सफल राहिलास.
२) हा मोठा बळी, एक मेंढा होता. ज्याला अल्लाहतआलाने, स्वर्गातून ह. जिब्रईल عليه السلام च्या मार्फत पाठविले. (इब्ने कसीर) इस्माईल عليه السلام च्या जागी त्याला जबाह करण्यात आले आणि मग या सुन्नते इब्राहिमला, कयामत पर्यंत, अल्लाह्चे सानिध्य प्राप्त करण्याचे एक साधन, आणि इदुल अजहाचे सर्वांत आवडते कर्म ठरवून देण्यात आले.
३) ह. इब्राहीम عليه السلام च्या या चर्चित घटनेनंतर, आता एक पुत्र इसहाकाची आणि त्याच्या पैगंबर होण्याची खुषखबर दिल्याने ठाऊक होते कीं, याच्या पूर्वी ज्या पुत्राला जबाह करण्याचा हुकूम देण्यात आला होता, ते इस्माईल عليه السلام होते. जे त्यावेळी इब्राहीम عليه السلام चे एकुलते एक पुत्र होते. इस्हाक عليه السلام चा जन्म त्यांच्यानंतर झालेला आहे.
४)म्हणजे या दोहोंच्या संततीला खूप पसरविले, आणि पैगंबरांची जास्त संख्या त्यांच्याच वंशातून झाली. ह. इस्हाकचे पुत्र ह. याकूब झालेत. ज्यांच्या बारा पुत्रांपासून बनी इस्राईलची १२ घराणी झाली. आणि यांच्यापासून बनी इस्राईलचा समाज वाढला आणि पसरला आणि बहुतेक पैगंबर त्यांच्यातूनच झालेत. ह. इब्राहीम عليه السلام चे दुसरे पुत्र, इस्माईल عليه السلام पासून अरबांचा वंश चालला आणि त्यांच्यात शेवटचे पैगंबर ह. मोहम्मद ﷺ झालेत.
५) शिर्क व पाप, आणि जुलूम व फिसाद करून इब्राहिमी घराणे आशीर्वादीत असून सुध्दा, सदाचारी आणि दुराचारी यांच्या उल्लेखाने, याकडे इशारा करून दिला कीं, घराणे आणि वाडवडीलांचा संबंध, अल्लाह्जवळ काही वजन ठेवीत नाहीत. तेथे तर ईमान आणि सुकृत्याचे महत्त्व आहे. यहूदी आणि खिस्ती जरी ह. इस्हाक عليه السلام च्या वंशातून आहेत. अशाच प्रकारे अरबस्थानचे मुशरिक ह. इस्माईल अ. च्या संतती पासून आहेत. परंतु त्यांची कर्मे आहेत. जी त्यांचे स्पष्ट बहकणे, किंवा शिर्क आणि गुन्हयांवर आधारित आहे. म्हणून हे उच्च संबंध, त्यांच्या करीता कर्माचा बदला होऊ शकत नाही.
६) म्हणजे त्यांना पैगंबरी आणि दुसरी बक्षीसे बहाल करण्यात आली.
७) म्हणजे फिरऔनाची गुलामी, त्याचा जुलूम आणि त्याच्या जुल्मी सत्तेपासून

| | |
|---|---|
| وَتَرَكْنَا عَلَيْهِمَا فِي الْاٰخِرِيْنَ ﴿١١٩﴾ | आणि आम्ही या उभयतांच्या मागे ही येणाऱ्यांसाठी (वंश) गोष्ट बाकी ठेवली; ११९ |
| سَلٰمٌ عَلٰى مُوْسٰى وَهٰرُوْنَ ﴿١٢٠﴾ | कीं, मूसा आणि हारून वर सलाम असो! १२० |
| اِنَّا كَذٰلِكَ نَجْزِى الْمُحْسِنِيْنَ ﴿١٢١﴾ | आम्ही सुकृत्ये करणाऱ्या लोकांना अशाच प्रकारे बदले देत असतो. १२१ |
| اِنَّهُمَا مِنْ عِبَادِنَا الْمُؤْمِنِيْنَ ﴿١٢٢﴾ | खचितच हे उभयता आमच्या ईमानदार सेवकांमधून होते. १२२ |
| وَاِنَّ اِلْيَاسَ لَمِنَ الْمُرْسَلِيْنَ ﴿١٢٣﴾ | नि:संशय इलयासपण पैगंबरामधून होते. (१) १२३ |
| اِذْ قَالَ لِقَوْمِهٖٓ اَلَا تَتَّقُوْنَ ﴿١٢٤﴾ | जेव्हा कीं त्यांनी आपल्या लोकांना सांगितले की, काय तुम्ही अल्लाहला भित नाही? (२) १२४ |
| اَتَدْعُوْنَ بَعْلًا وَّتَذَرُوْنَ اَحْسَنَ الْخَالِقِيْنَ ﴿١٢٥﴾ | काय तुम्ही 'बअल' (नावाच्या मूर्ती)ची प्रार्थना करतात? आणि सर्वांत उत्कृष्ट निर्माण कर्त्याला सोडून देतात? १२५ |
| اللّٰهَ رَبَّكُمْ وَرَبَّ اٰبَآئِكُمُ الْاَوَّلِيْنَ ﴿١٢٦﴾ | अल्लाह, जो तुमचा आणि तुमच्या पूर्वीच्या वाडवडीलांचा पालनकर्ता आहे. (३) १२६ |
| فَكَذَّبُوْهُ فَاِنَّهُمْ لَمُحْضَرُوْنَ ﴿١٢٧﴾ | परंतु, लोकांनी त्यांना खोटे ठरवले, तर ते जरूर (शिक्षेमध्ये) हजर केले जातील (४) १२७ |
| اِلَّا عِبَادَ اللّٰهِ الْمُخْلَصِيْنَ ﴿١٢٨﴾ | अल्लाहतआलाच्या निस्सीम सेवकांशिवाय १२८ |
| وَتَرَكْنَا عَلَيْهِ فِي الْاٰخِرِيْنَ ﴿١٢٩﴾ | आम्ही (इल्यासचे) सुस्मरण, मागील लोकांतपण कायम ठेवले १२९ |
| سَلٰمٌ عَلٰٓى اِلْ يَاسِيْنَ ﴿١٣٠﴾ | कीं, इलयास वर सलाम असो! (५) १३० |
| اِنَّا كَذٰلِكَ نَجْزِى الْمُحْسِنِيْنَ ﴿١٣١﴾ | आम्ही सुकृत्ये करणारास, अशाच प्रकारे बदले देत असतो. १३१ |
| اِنَّهٗ مِنْ عِبَادِنَا الْمُؤْمِنِيْنَ ﴿١٣٢﴾ | नि:संशय ते आमच्या ईमानदार सेवकांमधून होते (६) १३२ |
| وَاِنَّ لُوْطًا لَّمِنَ الْمُرْسَلِيْنَ ﴿١٣٣﴾ | नि:संशय 'लूत' पण पैगंबरामधून होते. १३३ |

१) हे ह. हारूनच्या संततीमधून, एक बनी इस्राईली पैगंबर होते. हे ज्या इलाख्यात पाठविले गेले होते, त्याचे नाव 'बअलबक' होते. काही म्हणतात त्या जागेचे नाव 'सामरा' आहे. जो पॅलेस्टाईन च्या पश्चिमी मध्ये इलाखा आहे. येथील लोक 'बअल' नामी मूर्तींचे पुजारी होते. (काही म्हणतात हे देवीचे नाव होते.)

२) म्हणजे त्याच्या शिक्षा आणि पकडीपासून की, त्याला सोडून तुम्ही अल्लाहशिवाय इतरांची उपासना करतात.

३) म्हणजे त्याची उपासना आणि पुजा करतात, त्या नावाचा नवस करतात. आणि तो फेडतात. त्याला इच्छापूर्ती करणारा समजतात. जी दगडाची मूर्ती आहे. आणि जो प्रत्येक वस्तुचा निर्माता, आणि मागच्या पुढच्या सर्वांचा पालनकर्ता आहे, त्याला तुम्ही विसरून गेला आहात.

४) म्हणजे एकेश्वरवाद आणि ईमानाला नाकारण्याच्या परीणामामध्ये नरकाग्नीची शिक्षा भोगतील.

५) इल्यासीन, इलियासचाच एक उच्चार आहे. जसे 'तुरे सयना' ला 'तुरे सिनीन' पण म्हणतात. ह. इलयासला दुसऱ्या पुस्तकात 'ईलीया' पण म्हटले गेले आहे.

६) कुरआनाने पैगंबरांचा उल्लेख करुन, त्यांच्या करिता बहुतेक ठिकाणी हे शब्द वापरले आहेत की, तो आमच्या ईमानदार सेवकांमधून होता. ज्याचे दोन उद्देश आहेत. एक त्यांच्या सद्चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या उंचीचे प्रदर्शन, जे ईमानाचे आवश्यक अंग आहे. यासाठी की त्या लोकांचे खंडन होऊन जावे, जे पुष्कळशा पैगंबरांच्या बाबतीत, चारित्र्यहीनतेचा आरोप करतात. जसे तौरात आणि इंजीलच्या सध्या असलेल्या आवृत्तीमध्ये, निरनिराळ्या पैगंबरांच्या बाबतीत अशा मनाने रचलेल्या गोष्टी, कहाण्या, शामील आहेत. दुसरा उद्देश, त्या लोकांचे खंडन आहे, जे काही पैगंबराच्या बाबतीत, मर्यादेच्या पुढे जाऊन, त्यांच्यात उपास्याची वैशिष्टये आणि अधिकार सिध्द करतात. म्हणजे ते पैगंबर जरुर होते, पण होते शेवटी अल्लाहचे सेवकच आणि गुलाम, न की उपास्य किंवा त्याचा काही भाग, किंवा त्याचे सरकतदार.

إِذْ نَجَّيْنَٰهُ وَأَهْلَهُۥٓ أَجْمَعِينَ ﴿١٣٤﴾
**आम्ही त्यांना आणि त्यांच्या संबंधितांना, सर्वांना सूटका दिली. (१३४)**

إِلَّا عَجُوزًا فِى ٱلْغَٰبِرِينَ ﴿١٣٥﴾
**त्या म्हातारी शिवाय, जी मागे राहून जाणाऱ्या मध्ये राहून गेली. [१] (१३५)**

ثُمَّ دَمَّرْنَا ٱلْءَاخَرِينَ ﴿١٣٦﴾
**मग आम्ही सर्वांना गारद करून टाकले. (१३६)**

وَإِنَّكُمْ لَتَمُرُّونَ عَلَيْهِم مُّصْبِحِينَ ﴿١٣٧﴾
**आणि तुम्ही सकाळ झाल्यानंतर, त्यांच्या वस्तीवरून जातात. (१३७)**

وَبِٱلَّيْلِ ۗ أَفَلَا تَعْقِلُونَ ﴿١٣٨﴾
**आणि रात्रीला सुध्दा. काय, तरीसुध्दा तुम्ही समजत नाहीत? [२] (१३८)**

وَإِنَّ يُونُسَ لَمِنَ ٱلْمُرْسَلِينَ ﴿١٣٩﴾
**आणि नि:संशय यूनुस पैगंबरांमधून होते. (१३९)**

إِذْ أَبَقَ إِلَى ٱلْفُلْكِ ٱلْمَشْحُونِ ﴿١٤٠﴾
**जेव्हा पळून पोहचले भरलेल्या नावेवर (१४०)**

فَسَاهَمَ فَكَانَ مِنَ ٱلْمُدْحَضِينَ ﴿١٤١﴾
**मग फासे टाकले गेले, तेव्हा हे पराजीत होऊन गेले. (१४१)**

فَٱلْتَقَمَهُ ٱلْحُوتُ وَهُوَ مُلِيمٌ ﴿١٤٢﴾
**मग त्यांना माशाने गिळून टाकले, मग ते आपल्या स्वत:लाच दोष देऊ लागले. [३] (१४२)**

فَلَوْلَآ أَنَّهُۥ كَانَ مِنَ ٱلْمُسَبِّحِينَ ﴿١٤٣﴾
**मग जर ते (अल्लाहचे) पावित्र्य वर्णन करणाऱ्यांमधून नसते; (१४३)**

لَلَبِثَ فِى بَطْنِهِۦٓ إِلَىٰ يَوْمِ يُبْعَثُونَ ﴿١٤٤﴾
**तर लोकांना उठविल्या जाणाऱ्या दिवसापर्यंत त्याच्या पोटांतच राहते [४] (१४४)**

१) याच्याने अभिप्रेत ह.लूत عليه السلام ची पत्नी आहे, जी काफिर होती. ती ईमानवाल्यांबरोबर त्या वस्तीच्या बाहेर गेली नव्हती. कारण की, तिला आपल्या लोकांबरोबर गारद होणे होते. म्हणून तिला पण गारद करुन देण्यात आले.

२) हे मक्कावाल्यांना सांगणे आहे. जे व्यापारी प्रवासात, या नष्ट झालेल्या इलाख्यावरून येत जात असत. यांना सांगण्यात येत आहे. कीं, तुम्ही सकाळच्यां वेळेला सुध्दा, आणि रात्रीच्या वेळी सुध्दां, या वस्तींवरून जातात, जेथे आता मृत समुद्र आहे; जो पहाण्यातही घृणास्पद, आहे आणि फारच सडलेला, आणि दुर्गंधयुक्त काय तुम्ही त्यांना पाहून, ही गोष्ट समजत नाही की, पैगंबराला खोटे ठरवण्यामुळे, त्यांचा हा वाईट परिणाम झाला; तर तुमच्या या चालीचा परिणाम सुध्दां, याच्यापेक्षा वेगळा का होईल? जेव्हा तुम्हीसुध्दा तेच काम करीत आहांत, जे त्यांनी केले. तर मग तुम्ही अल्लाहच्या शिक्षेपासून कसे काय सुरक्षित रहाल?

३) ह. यूनुस عليه السلام ला इराकचा इलाखा 'नैनवा' (सध्यांचे मोसिल)मध्यें पैगंबर बनवून पाठविले गेले होते. ही अशुरियांची राजधानी होती. त्यांनी एक लाख बनु इसराईलींना कैदी बनवून ठेवले होते. म्हणून त्यांच्या हिदायत आणि मार्गदर्शनासाठीं, अल्लाहतआलाने, त्यांच्याकडे ह. यूनुस عليه السلام ला पाठविले. परंतु या लोकांनी त्यांच्यावर ईमान आणले नाही. सरशेवटी, आपल्या लोकांना भिवविले कीं, लवकरच तुम्ही अल्लाहच्या शिक्षेत पकडले जाल. शिक्षा येण्यांत उशीर झाला, तेव्हा अल्लाहच्या परवानगी शिवायच, स्वत: तेथून निघून गेले. आणि समुद्रावर जाऊन, एका नावेत स्वार होऊन गेले. आपल्या इलाख्यांतून निघून जाण्याला, अशा शब्दांनी संबोधित केले, ज्याप्रमाणे एक गुलाम आपल्याा धन्याकडून पळून चालला जातो. कारण कीं ते सुध्दा, अल्लाहच्या परवानगी शिवायच, आपल्या लोकांना सोडून चालले गेले होते. नाव स्वारांनी आणि सामानांनी भरलेली होती. नाव समुद्राच्या लाटांमध्ये घेरली गेली. आणि थांबून उभी राहिली. म्हणून तिचे वजन कमी करण्यासाठी एखाद्या माणसाला समुद्रात फेकून देण्याची योजना समोर आली, जेणेकरून नावेत स्वार असलेल्या दुसऱ्या लोकांचे प्राण वाचून जावे. परंतु हे बलिदान देण्यास कुणी तयार नव्हते. म्हणून फांसे टाकावे लागले. (अयसरूत तफासीर) काही म्हणतात कीं, त्या काळांत, ही गोष्ट मशहूर होती कीं, नाव भोवऱ्यांत यासाठी फसते कीं, कोणी गुलाम आपल्या धन्यापासून पळून आलेला असतो. म्हणून या फरार झालेल्या करिता, त्यांना फांसे टाकावे लागले. ज्यात ह. यूनुस عليه السلام चे नाव आले. आणि ते पराजीत झालेल्यामधून होऊन गेले. म्हणजे फासांच्या निकालाप्रमाणे त्यांना आपल्या पळून आलेल्या गुलामाप्रमाणे समुद्राच्या लाटांच्या स्वाधीन करावे लागले. इकडे अल्लाहतआलाने माशाला हुकूम दिला कीं, त्याने त्यांना सही सलामत गिळून घ्यावे. आणि अशाप्रकारे ह. यूनुस عليه السلام माशाच्या पोटांत चालले गेले.

४) म्हणजे पश्चात्ताप आणि क्षमायाचना आणि अल्लाहचे पावित्र्य वर्णन न करते, (जसे कीं, त्यांनी ''लाइलाहा इल्ला अंता सुबहानक इन्नी कुन्तु मिनज् जालेमीन.'' (सू. अंबिया - ८७) म्हटले तर कयामत पर्यंत माशाच्या पोटांतच राहिले असते.

فَنَبَذْنٰهُ بِالْعَرَآءِ وَهُوَ سَقِيْمٌ ﴿١٤٥﴾

मग आम्ही त्याला एका सपाट मैदानावार टाकून दिले. आणि ते त्यावेळी आजारी[१] होते. १४५

وَ اَنْۢبَتْنَا عَلَيْهِ شَجَرَةً مِّنْ يَّقْطِيْنٍ ﴿١٤٦﴾

आणि त्यांच्यावर सावली करणारा भोपळ्याच्या प्रकारातील एक वृक्ष आम्ही[२] उगवून दिला. १४६

وَ اَرْسَلْنٰهُ اِلٰى مِائَةِ اَلْفٍ اَوْ يَزِيْدُوْنَ ﴿١٤٧﴾

आणि आम्ही त्याला एक लाख , किंबहुना आणखी जास्त लोकांकडे पाठविले १४७

فَاٰمَنُوْا فَمَتَّعْنٰهُمْ اِلٰى حِيْنٍ ﴿١٤٨﴾

मग त्यांनी ईमान आणले[३]; मग आम्ही त्यांना एका काळापर्यंत सुखोपभोग दिला. १४८

فَاسْتَفْتِهِمْ اَلِرَبِّكَ الْبَنَاتُ وَلَهُمُ الْبَنُوْنَ ﴿١٤٩﴾

त्यांना विचारा की, काय आपल्या पालनकर्त्याच्या तर मुली आहेत; आणि त्यांच्या करीता मुलगे आहेत? १४९

اَمْ خَلَقْنَا الْمَلٰٓئِكَةَ اِنَاثًا وَّهُمْ شٰهِدُوْنَ ﴿١٥٠﴾

किंवा हे त्यावेळी उपस्थित होते, जेव्हा की, आम्ही देवदुतांना स्त्रीलिंगी निर्माण केले?[४] १५०

اَلَآ اِنَّهُمْ مِّنْ اِفْكِهِمْ لَيَقُوْلُوْنَ ﴿١٥١﴾

सावध व्हा! की, हे लोक फक्त थोतांड रचून म्हणत आहे १५१

وَلَدَ اللّٰهُ ۙ وَ اِنَّهُمْ لَكٰذِبُوْنَ ﴿١٥٢﴾

की, अल्लाहतआलाची संतती आहे; खचितच हे लोक निव्वळ लबाड आहेत १५२

اَصْطَفَى الْبَنَاتِ عَلَى الْبَنِيْنَ ﴿١٥٣﴾

काय अल्लाहतआलाने आपल्या करिता मुलींना, मुलांवर प्राधान्य दिले?[५] १५३

مَا لَكُمْ ۫ كَيْفَ تَحْكُمُوْنَ ﴿١٥٤﴾

तुम्हांस काय होऊन गेले आहे? कसे हुकूम लावत फिरतात? १५४

اَفَلَا تَذَكَّرُوْنَ ﴿١٥٥﴾

काय तुम्ही एवढेही समजत नाही?[६] १५५

اَمْ لَكُمْ سُلْطٰنٌ مُّبِيْنٌ ﴿١٥٦﴾

किंवा तुमच्याजवळ याचे काही प्रमाण आहे? १५६

فَأْتُوْا بِكِتٰبِكُمْ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿١٥٧﴾

तर जा! जर खरे आहात, तर आपलेच पुस्तक घेऊन या.[७] १५७

१) जसे जन्मते वेळी मूल किंवा जनावराचे अपत्य असते, निढाळ, दुर्बल आणि अशक्त

२) 'यकतीन' प्रत्येक त्या वेलाला म्हणतात, जो आपल्या खोडावर उभा राहूशकत नाही. जसे दुधी, भोपळा वगैरेचा वेल. म्हणजे त्या सपाट मैदानांत जेथे कोणी वृक्ष नव्हता, न इमारत. एक सावली देणारी वेल उगवून, आम्ही त्यांचे संरक्षण केले.

३) त्यांच्या ईमान आणण्याच्या कैफियतचे वर्णन, सू.यूनुस- ९८ मध्यें, येऊन चुकले आहे.

४) म्हणजे देवदुतांना जे हे अल्लाहच्या मुली ठरवितात, तर काय, जेव्हा आम्ही देवदूत निर्माण केले होते, हे त्या ठिकाणी उपस्थित होते. आणि त्यांनी देवदूतांमध्ये, स्त्रियांच्या वैशिष्ट्यांना प्रत्यक्ष पाहिले होते?

५) जेव्हा कीं हे स्वत: आपल्याकरितां, मुली नाही, मुलगे पसंत करतात.

६) कीं, जर अल्लाहची संतती असती, तर पुरूष असती, ज्याला तुम्ही पण पसंत करतां, आणि उत्तम समजतात, न की मुली, ज्या तुमच्या दृष्टीने कनिष्ठ आणि क्षुल्लक आहे.

७) म्हणजे बुध्दी या धारणेच्या योग्य असण्याला मान्य करीत नाही कीं, अल्लाहची संतती आहे. आणि ती पण स्त्रीलिंगी. चला! काही नकली प्रमाणच दाखवून द्या. कोणी पुस्तक जे अल्लाहने उतारले असेल, यांच्यात अल्लाहला संतती असण्याला मान्यता किंवा हवाला असावा?

وَجَعَلُوْا بَيْنَهٗ وَبَيْنَ الْجِنَّةِ نَسَبًا ۭ وَلَقَدْ عَلِمَتِ الْجِنَّةُ اِنَّهُمْ لَمُحْضَرُوْنَ ﴿١٥٨﴾

आणि या लोकांनी तर अल्लाहच्या आणि जिन्नातांच्या दर्म्यान, नाते संबंध ठरविले आहे. (१) आणि वास्तविक खुद्द जिन्नात पक्का विश्वास ठेवतात की, (या धारणेचे लोक, शिक्षांच्या समोर) पुढे केले जातील (२) १५८

سُبْحٰنَ اللّٰهِ عَمَّا يَصِفُوْنَ ﴿١٥٩﴾

जे काही हे सांगत आहे, यापासून अल्लाहतआला फारच (परम) पवित्र आहे. १५९

اِلَّا عِبَادَ اللّٰهِ الْمُخْلَصِيْنَ ﴿١٦٠﴾

पण अल्लाहचे निस्सीम भक्त (३) १६०

فَاِنَّكُمْ وَمَا تَعْبُدُوْنَ ﴿١٦١﴾

विश्वास ठेवा की, तुम्ही सर्व आणि तुमचे असत्य उपास्य, १६१

مَآ اَنْتُمْ عَلَيْهِ بِفٰتِنِيْنَ ﴿١٦٢﴾

कोणा एकालाही बहकवूशकत नाही. १६२

اِلَّا مَنْ هُوَ صَالِ الْجَحِيْمِ ﴿١٦٣﴾

शिवाय त्याच्या जो नर्कवासीच (४) आहे. १६३

وَمَا مِنَّآ اِلَّا لَهٗ مَقَامٌ مَّعْلُوْمٌ ﴿١٦٤﴾

(देवदुतांचे म्हणणे आहे की) आमच्यातून तर प्रत्येकाची जागा निश्चित आहे. (५) १६४

وَّاِنَّا لَنَحْنُ الصَّآفُّوْنَ ﴿١٦٥﴾

आणि आम्ही तर (अल्लाहच्या उपासनेत) रांगा बांधून उभे आहोत. १६५

وَاِنَّا لَنَحْنُ الْمُسَبِّحُوْنَ ﴿١٦٦﴾

आणि त्याचे पावित्र्य वर्णन करीत आहोत. (६) १६६

وَاِنْ كَانُوْا لَيَقُوْلُوْنَ ﴿١٦٧﴾

काफिर तर म्हणत असत, १६७

لَوْ اَنَّ عِنْدَنَا ذِكْرًا مِّنَ الْاَوَّلِيْنَ ﴿١٦٨﴾

जर आमच्या जवळ पूर्वीच्या लोकांचे पुस्तक असते, १६८

لَكُنَّا عِبَادَ اللّٰهِ الْمُخْلَصِيْنَ ﴿١٦٩﴾

तर आम्ही सुध्दा अल्लाहचे निवडक सेवक बनून गेलो असतो. (७) १६९

१) हा इशारा आहे मुशरिकीनच्या या धारणेकडे कीं, अल्लाहने जिन्नातांबरोबर नातेसंबंध कायम केला, ज्यांच्यापासून मुली जन्माला आल्या. याच अल्लाहच्या मुली देवदूत आहेत. अशाप्रकारें, अल्लाह आणि जिन्नांच्या दर्म्यान नातेसंबंध (सासरकडचे नाते) कायम होऊन गेले.

२) वास्तविक ही गोष्ट कशी काय बरोबर असू शकते? जर असे असते तर अल्लाहतआला, जिन्नातांना शिक्षेत का टाकता? काय त्याने आपल्या नाते संबंधाचा विचार केला नसता? आणि जर असे नाही, किंबहुना स्वत: जिन्नातपण समजतात की, त्यांना अल्लाहची शिक्षा भोगण्यासाठी नगकाग्नीमध्ये अवश्य जावे लागेल. तर मग अल्लाह आणि जिन्नातांच्या दर्म्यान नातेसंबंध कशाप्रकारे होऊ शकते?

३) म्हणजे हे अल्लाहच्या बाबतीत अशा गोष्टी म्हणत नाही, ज्यापासून तो पवित्र आहे. हा मुशरिकीनचाच अंदाज आहे. किंवा हा अर्थ आहे कीं, नरकाग्नीमध्ये जिन्नात आणि मुशरिकीनच हजर केले जातील, अल्लाहचे निस्सीम (निवडक) सेवक नाही. त्यांच्यासाठी तर अल्लाहने स्वर्ग तयार करून ठेवला आहे.

४) म्हणजे तुम्ही आणि तुमचे निरर्थक उपास्य, कोणाला बहकविण्याला समर्थ नाहीत, त्यांच्याशिवाय, जे अल्लाहच्या ज्ञानांत पूर्वींच नरकवासी आहेत. आणि याच कारणाने ते कुफ्र आणि शिर्कवर अडून आहेत.

५) म्हणजे अल्लाहच्या उपासनेकरिता हे देवदूतांचे म्हणणे आहे.

६) अर्थ हा आहे की, देवदूत सुध्दाअल्लाहच्या निर्मिती, आणि अल्लाहचे खास सेवक आहेत; जे नेहमी अल्लाहच्या उपासनेमध्ये, आणि त्याच्या पावित्र्य वर्णनांत व्यस्त राहतात. न कीं ते, अल्लाहच्या मुली आहेत, जसे कीं, मुशरिकीन म्हणतात.

७) जिक्रने अभिप्रेत अल्लाहचे कोणी पुस्तक, किंवा पैगंबर आहे. म्हणजे हे काफिर कुरआनाच्या अवतरण्यापूर्वी, म्हणत असत की, आमच्या जवळ पण कोणी आकाशी ग्रंथ असता, ज्याप्रमाणे पहिल्या लोकांवर तौरात वगैरे अवतीर्ण झाले. किंवा कोणी हिदायत करणारा आणि भिवविणारा आम्हाला प्रवचन आणि उपदेश करणारा असता, तर आम्ही सुध्दाअल्लाहचे निस्सीम सेवक होऊन गेलो असतो.

فَكَفَرُوْا بِهٖ فَسَوْفَ يَعْلَمُوْنَ ﴿١٧٠﴾

**परंतु मग [१] या कुरआनाबरोबर कुफ्र (म्हणजे याला नाकारून) करून गेले मग आता लवकरच जाणून घेतील. [२] (१७०)**

وَلَقَدْ سَبَقَتْ كَلِمَتُنَا لِعِبَادِنَا الْمُرْسَلِيْنَ ﴿١٧١﴾

**आणि अलबत्ता आमचा वायदा, पहिलेच आपल्या पैगंबरांसाठी सादर होऊन चुकला आहे. (१७१)**

اِنَّهُمْ لَهُمُ الْمَنْصُوْرُوْنَ ﴿١٧٢﴾

**की निश्चितच तेच मदत दिले जातील. (१७२)**

وَاِنَّ جُنْدَنَا لَهُمُ الْغٰلِبُوْنَ ﴿١٧٣﴾

**आणि आमचेच सैन्य प्रबळ (आणि वरचढ) राहील. [३] (१७३)**

فَتَوَلَّ عَنْهُمْ حَتّٰى حِيْنٍ ﴿١٧٤﴾

**आतांआपण काही काळ यांच्याकडून तोंड फिरवून घ्या. [४] (१७४)**

وَّاَبْصِرْهُمْ فَسَوْفَ يُبْصِرُوْنَ ﴿١٧٥﴾

**आणि त्यांना पहात रहा; [५] आणि हे पण पुढे जाता पाहून घेतील. (१७५)**

اَفَبِعَذَابِنَا يَسْتَعْجِلُوْنَ ﴿١٧٦﴾

**काय हे आमच्या शिक्षेसाठी घाई करीत आहे? (१७६)**

فَاِذَا نَزَلَ بِسَاحَتِهِمْ فَسَآءَ صَبَاحُ الْمُنْذَرِيْنَ ﴿١٧٧﴾

**ऐका! मग जेव्हा आमची शिक्षा, यांच्या अंगणात येऊन धडकेल, त्यावेळी ज्यांना पहिलेच सावध करून दिले गेले होते, त्यांची ही सकाळ फारच [६] वाईट होईल. (१७७)**

وَتَوَلَّ عَنْهُمْ حَتّٰى حِيْنٍ ﴿١٧٨﴾

**आपण काही काळापर्यंत यांचा विचार सोडून द्या. (१७८)**

وَّاَبْصِرْ فَسَوْفَ يُبْصِرُوْنَ ﴿١٧٩﴾

**आणि पाहत रहा. हे पण लवकरच पाहून घेतील. [७] (१७९)**

سُبْحٰنَ رَبِّكَ رَبِّ الْعِزَّةِ عَمَّا يَصِفُوْنَ ﴿١٨٠﴾

**पवित्र आहे तुमचा पालनकर्ता जो मोठा प्रतिष्ठावान आहे, प्रत्येक त्या गोष्टीपासून (जे मुशरिक) लोक सांगत असतात. [८] (१८०)**

وَسَلٰمٌ عَلَى الْمُرْسَلِيْنَ ﴿١٨١﴾

**पैगंबरांवर सलाम असो! [९] (१८१)**

१) म्हणजे त्यांच्या आकांक्षेप्रमाणे जेव्हा रसूलुल्लाह ﷺ मार्गदर्शक बनून आले. कुरआन ही अवतरीत केले गेले. तर त्यांच्यावर ईमान आणण्याऐवजी त्यांचा इन्कार केला.

२) ही दरडावणी आणि धमकी आहे. की, या (नाकारण्याचा) परिणाम लवकरच त्यांना ठाऊक होऊन जाईल.

३) जसे दुसऱ्या ठिकाशी सांगितले, ''अल्लाहतआला लिहून चुकला आहे कीं, नि:संशय मी आणि माझे पैगंबर प्रबळ राहू'' (सू.मुजादिला-२१)

४) म्हणजे त्यांच्या गोष्टींवर आणि इजा देण्यावर सहनशिलता पत्करा

५) कीं, केव्हा त्यांच्यावर अल्लाहची शिक्षा येते?

६) मुसलमान जेव्हा खैबरवर हल्ला करण्यास गेले, तर यहूदी त्यांना पाहून घाबरून गेले. ज्यावर नबी ﷺ नी पण, 'अल्लाहू अकबर' म्हणून फर्माविले होते, खैबर बरबाद झाले, जेव्हा आम्ही कोण्या समूहाच्या मैदानात उतरतो (आक्रमण करतो) तर भिवविलेल्या लोकांची सकाळ वाईट होऊन जाते. (स.बुखारी, स.मुस्लिम)

७) हे ताकीद म्हणून दोनदा सांगण्यात आले. किंवा पहिल्या महावाक्याने अभिप्रेत जगातील त्या शिक्षा आहेत ज्या मक्कावाल्यांना, बद्र व उहद आणि दुसऱ्या युध्दामध्ये, मुसलमानांच्या हस्ते काफिरांना ठार मारणे आणि कैदी बनविणे या स्वरूपांत देण्यात आल्या आणि दुसऱ्या महावाक्यांत त्या शिक्षेचा उल्लेख आहे, ज्यात काफिर आणि मुशरिकीन यांना परलोकांत ग्रस्त व्हावे लागेल.

८) याच्यात ते ऐब आणि दोष, ज्यापासून अल्लाह पवित्र आहे, ते सांगण्यात आले आहे; जे मुशरिकीन अल्लाहसाठी सांगत असतात. उदाहरणार्थ, त्याची संतती आहे, किंवा कोणी त्याचा सरकतदार आहे. या कोताया सेवकांमध्ये असतात. आणि संतती आणि भागीदारांचे गरजवंत पण तेच असतात. अल्लाह या सर्व गोष्टीपासून उच्च आणि पवित्र आहे; कारण की तो कोणाचा मोहताजच नाही की, त्याला संततीची किंवा कोण्या भागीदाराची आवश्यकता भासावी.

९) की त्यांनी अल्लाहचा संदेश, जगातील लोकांकडे पोहचविला; ज्यावर खचित्च ते सलाम आणि मानसन्मानाला पात्र आहेत.

وَالْحَمْدُ لِلّٰهِ رَبِّ الْعٰلَمِيْنَ ﴿١٨٢﴾

आणि सर्व स्तुती अल्लाहकरिता आहे, जो सकल जगाचा पालनकर्ता आहे.[१] (१८२)







صٓ وَالْقُرْاٰنِ ذِى الذِّكْرِ ﴿١﴾

सॉद! या उपदेशपुर कुरआनाची शपथ![२] (१)

بَلِ الَّذِيْنَ كَفَرُوْا فِيْ عِزَّةٍ وَّشِقَاقٍ ﴿٢﴾

किंबहुना काफिर अहंकार आणि विरोधांत पडलेले आहेत.[३] (२)

كَمْ اَهْلَكْنَا مِنْ قَبْلِهِمْ مِّنْ قَرْنٍ فَنَادَوْا وَّلَاتَ حِيْنَ مَنَاصٍ ﴿٣﴾

आम्ही यांच्या पूर्वीपण, पुष्कळशा पिढ्यांना नष्ट करून टाकले;[४] त्यांनी सतत हाकाटी केली. परंतु तो वेळ सुटकेचा नव्हता.[५] (३)

وَعَجِبُوْٓا اَنْ جَآءَهُمْ مُّنْذِرٌ مِّنْهُمْ وَقَالَ الْكٰفِرُوْنَ هٰذَا سٰحِرٌ كَذَّابٌ ﴿٤﴾

आणि काफिरांना या गोष्टीचे आश्चर्य वाटले की, त्यांच्यातूनच एक त्यांना भिवविण्याला आला;[६] आणि म्हणू लागले की, हा तर जादूगीर आणि लबाड आहे. (४)

اَجَعَلَ الْاٰلِهَةَ اِلٰهًا وَّاحِدًا اِنَّ هٰذَا لَشَيْءٌ عُجَابٌ ﴿٥﴾

काय त्याने इतक्या साऱ्या उपास्यांचा एकच उपास्य करून टाकला. खरोखर ही फारच विचित्र गोष्ट आहे.[७] (५)

१) हे सेवकांना समजाविण्यात येत आहे की, अल्लाहने तुमच्यावर उपकार केला आहे. पैगंबर पाठविलेत, पुस्तके अवतीर्ण केलीत, आणि पैगंबरांनी तुम्हास अल्लाहचा संदेश पोहचविला. म्हणून तुम्ही अल्लाहचे आभार माना. काही म्हणतात की काफिरांना गारद करून ईमानवाल्यांना आणि पैगंबरांना वांचविले, यावर अल्लाहचे आभार माना. 'हमद्' चा अर्थ आहे, मान सन्मानाच्या भावाने सुंदर शब्दांत स्तुती करणे, त्याचा चांगला उल्लेख करणे, आणि त्याची महान शान वर्णन करणे.

२) ज्याच्यांत तुमच्यासाठी प्रत्येक प्रकारचा उपदेश, आणि अशा प्रकारच्या गोष्टी आहेत, ज्यामुळे तुमचे जग पण सावरले जावे, आणि परलोक सुध्दा. काहींनी 'जीज् जिक्र' चे भाषांतर, शान आणि मर्तबेवाला चे केले आहे. इमाम इब्ने कसीर म्हणतात, दोन्ही अर्थ बरोबर आहेत. यासाठी कीं, कुरआन महान शानवाले पण आहे, आणि ईमान आणि ईशभय बाळगणाऱ्यांसाठी उपदेश आणि बोध घेण्यासाठी धडा पण आहे. या शपथेचे उत्तर 'महजुफ' आहे कीं, गोष्ट अशा प्रकारे नाही, ज्या प्रमाणे मक्केचे काफिर म्हणत आहेत की मुहम्मद (सल्लल्लाहु व अलैहि व सल्लम) जादूगीर, कवी किंवा लबाड आहेत. किंबहुना ते अल्लाहचे खरे पैगंबर आहेत, ज्यांच्यावर हे शानवाले कुरआन अवतीर्ण झाले आहे.

३) म्हणजे हे कुरआन तर खचित्च शंकेपासून पवित्र, आणि त्यांच्यासाठी एक बोध आहे; जो याच्यापासून धडा घेईल. तथापि या काफिरांना याच्या पासून फायदा यासाठी पोहचत नाही की यांच्या डोक्यात अहंकार आणि गर्व आहे, आणि मनामध्ये विरोध आणि हट्ट आहे. 'इज्जत' चा अर्थ होत आहे, सत्याच्या मुकाबल्यात अकडणे.

४) जे यांच्यापेक्षा जास्त मजबुत आणि शक्तीमान होते. परंतु कुफ्र आणि खोटे ठरवण्यामुळे वाईट परिणामात ग्रस्त झालेत.

५) म्हणजे त्यांनी शिक्षा पाहून मदतीसाठीं, धावा केला, आणि पश्चात्ताप व्यक्त करण्यास तयार असल्याचे जाहीर केले. परंतु ती वेळ तौबा मान्य करण्याची नव्हती, आणि पळून जाण्याची पण नव्हती. म्हणून त्यांचे ईमान कबूल झाले नाही. न ते पळून जाऊन शिक्षेपासून वाचू शकले.

६) म्हणजे त्यांच्याच सारखा एक मनुष्य पैगंबर कसा बनून गेला?

७) म्हणजे एकच अल्लाह् साऱ्या ब्रम्हांडाची व्यवस्था पाहणारा आहे. त्याचा कोणी सरकतदार नाहीं. अशाच प्रकारे उपासना आणि नवस मानण्याला पात्र सुध्दा फक्त तोच एक आहे. ही त्याच्यासाठी आश्चर्य जनक गोष्ट होती.

وَانْطَلَقَ الْمَلَاُ مِنْهُمْ اَنِ امْشُوْا وَاصْبِرُوْا عَلٰٓى اٰلِهَتِكُمْ ۖۚ اِنَّ هٰذَا لَشَیْءٌ یُّرَادُ ٦

**त्यांचे सरदार हे म्हणत चालू लागले की, चला आणि आपल्या उपास्यांवर जमून रहा.[१] खचितच् हा तर काही स्वार्थ आहे.[२]** ⑥

مَا سَمِعْنَا بِهٰذَا فِی الْمِلَّةِ الْاٰخِرَةِ ۖۚ اِنْ هٰذَآ اِلَّا اخْتِلَاقٌ ٧

**आम्ही तर ही गोष्ट मागच्या धर्मात पण ऐकली नाही;[३] काही नाही, ही तर फक्त बनावट[४] आहे.** ⑦

ءَاُنْزِلَ عَلَیْهِ الذِّكْرُ مِنْۢ بَیْنِنَا ؕ بَلْ هُمْ فِیْ شَكٍّ مِّنْ ذِكْرِیْ ۚ بَلْ لَّمَّا یَذُوْقُوْا عَذَابِ ٨

**काय आम्हा सर्वांमधून त्याच्यावरच अल्लाहची वाणी अवतरीत केली गेली.[५] मुळात हे लोक माझ्या 'वही' कडून संशयात आहे.[६] किंबहुना (खरे हे आहे की) त्यांनी आतापर्यंत माझ्या शिक्षेची गोडी चाखलीच नाही.[७]** ⑧

اَمْ عِنْدَهُمْ خَزَآىِٕنُ رَحْمَةِ رَبِّكَ الْعَزِیْزِ الْوَهَّابِ ٩

**किंवा काय, त्यांच्याजवळ परम समर्थ आणि उदार अल्लाह्चे खजीने आहेत?[८]** ⑨

اَمْ لَهُمْ مُّلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا بَیْنَهُمَا ۫ فَلْیَرْتَقُوْا فِی الْاَسْبَابِ ١٠

**किंवा काय आकाश आणि पृथ्वी, आणि यांच्या दर्म्यानच्या प्रत्येक वस्तुचे अधिपत्य यांच्याच जवळ आहे? तर मग यांनी दोर बांधून चढून जावे.[९]** ⑩

१) म्हणजे आपल्या धर्मावर दृढ जमून रहा आणि मुर्तींची उपासना करीत रहा. मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) च्या गोष्टीकडे लक्ष देऊ नका.

२) म्हणजे हा आम्हाला आमच्या उपास्यापासून सोडवून, खरे म्हणजे आम्हास आपल्या मागे लावून, आपले पुढारपण आणि मोठेपण, मान्य करवू इच्छितो.

३) मागील धर्माने अभिप्रेत एक तर त्यांचाच कुरेशी धर्म आहे. किंवा मग ख्रिस्त्यांचा धर्म. म्हणजे हा जो एकेश्वर वादाचे आवाहन करीत आहे, याच्या बाबतीत तर आम्ही कोणत्याही धर्मांत ऐकले नाही.

४) म्हणजे हा एकेश्वरवाद फक्त याचा आपलाच घडविलेला आहे. नाहीतर ख्रिस्ती धर्मात सुध्दा, दुसऱ्यांना पण उपास्यांमध्ये शामील, मान्य केले गेले आहे.

५) म्हणजे मक्केमध्ये मोठमोठे पुढारी आणि श्रीमंत आहेत. जर अल्लाह कोणाला पैगंबर बनवूच इच्छिता, तर यांच्यातून कोणाला बनवता. या सर्वांना सोडून, वह्य आणि पैगंबरीसाठी, मोहम्मद (सल्ल.) ची निवड पण मोठी विचित्र आहे? हे जणू त्यांनी अल्लाहच्या निवडीत दोष काढले.

६) म्हणजे यांचे नाकारणे यासाठी नाही कीं, त्यांना मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या खरेपणाचे ज्ञान नाही किंवा त्यांना, आपण (सल्ल.च्या) सद् बुध्दीचा इनकार आहे. किंबहुना ते त्या वहया बाबत शंकेत व्यस्त आहेत, जे आपल्यावर अवतरीत झाले. ज्यांच्यात सर्वांत ठळक एकेश्वरवादाचे आवाहन आहे.

७) कारण कीं शिक्षेची गोडी चाखून घेतली असती, तर इतक्या स्पष्ट गोष्टीला खोटे ठरवले नसते. आणि जेव्हा हे या खोटे म्हणण्याची खरी मजा चाखतील, तर तो वेळ असा असेल कीं, तर न मान्य करणे कामास येईल न ईमानच फायदा देईल.

८) की हे ज्याला इच्छील देईल, आणि ज्याला इच्छितील त्याला देणार नाही. याच खजिन्यामध्ये पैगंबरी सुध्दाआहे. किंबहुना पालनकर्त्याच्या खजिन्याचा मालक तोच वहाब आहे, जो भरपूर देणारा आहे, मग त्यांना मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीला नकार का आहे? ज्याला या प्रदान करणाऱ्या, पालनकर्त्याने आपली खास दया प्रदान केली आहे.

९) म्हणजे आकाशावर चढून या वह्याचा क्रम खंडीत करून टाकावा. जी मोहम्मद (ﷺ) वर अवतीर्ण होत आहे 'असबाब' 'सबब' चे अनेकवचन आहे. याचा शब्दकोशीय अर्थ, प्रत्येक त्या गोष्टीचा आहे, जिच्या मार्फत वांच्छनीयापर्यंत पोहचले जावे. मग ती कोणती का वस्तू असेना. म्हणून याचे वेगवेगळे अर्थ केले गेले आहे. दोऱ्यांच्या शिवाय एक भाषांतर दरवाजेपण केला गेला आहे, ज्यांतून देवदूत पृथ्वीवर उतरतात. म्हणजे शिडींच्या मार्फत आकाशाच्या दरवाज्यांपर्यंत पोहचले जावे आणि वह्य बंद करून टाकावे (फत्हुल कदीर)

جُندٌ مَّا هُنَالِكَ مَهْزُومٌ مِّنَ الْأَحْزَابِ ﴿١١﴾

**हे पण (मोठमोठ्या) सैन्यांमधून, पराभूत झालेले (लहानसे) सैन्य आहे.[१] ११**

كَذَّبَتْ قَبْلَهُمْ قَوْمُ نُوحٍ وَعَادٌ وَفِرْعَوْنُ ذُو الْأَوْتَادِ ﴿١٢﴾

**यांच्या पूर्वी सुध्दा नूह आणि आदच्या लोकांनी आणि मेखावाल्या (खिळेवाला) फिरऔनाने[२] खोटे ठरवले होते. १२**

وَثَمُودُ وَقَوْمُ لُوطٍ وَأَصْحَابُ لْئَيْكَةِ ۚ أُولَٰئِكَ الْأَحْزَابُ ﴿١٣﴾

**आणि 'समूद आणि लूतच्या लोकांनी, आणि 'ऐकांच्या' रहाणाऱ्यांनी[३] पण. हेच (मोठे) लष्कर होते. १३**

إِن كُلٌّ إِلَّا كَذَّبَ الرُّسُلَ فَحَقَّ عِقَابِ ﴿١٤﴾

**यांच्यातून एक पण असा नव्हता, ज्याने पैगंबरांना खोटे ठरवले नसेल, मग माझी शिक्षा त्यांच्यावर सिद्ध होऊन राहिली. १४**

وَمَا يَنظُرُ هَٰؤُلَاءِ إِلَّا صَيْحَةً وَاحِدَةً مَّا لَهَا مِن فَوَاقٍ ﴿١٥﴾

**यांना फक्त एका भयंकर आवाजाची प्रतीक्षा आहे;[४] ज्यांच्यात थांबणे (आणि ढील) नाही.[५] १५**

وَقَالُوا رَبَّنَا عَجِّل لَّنَا قِطَّنَا قَبْلَ يَوْمِ الْحِسَابِ ﴿١٦﴾

**आणि त्यांनी म्हटले की हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या वाट्यांचे आम्हांस, हिशेबाच्या दिवसापूर्वीच देऊन टाक.[६] १६**

اصْبِرْ عَلَىٰ مَا يَقُولُونَ وَاذْكُرْ عَبْدَنَا دَاوُودَ ذَا الْأَيْدِ ۖ إِنَّهُ أَوَّابٌ ﴿١٧﴾

**तुम्ही यांच्या गोष्टींवर सहनशिलता पत्करा आणि आमचा सेवक 'दाऊद' चे स्मरण करा, जो मोठा बलसंपन्न होता.[७] खचित्‌च तो फारच (आमच्याकडे) वळणारा होता. १७**

१) हे अल्लाहतआलाकडून नबी सल्लल्लाहु अलैहिंव सल्लमची मदत आणि काफिरांच्या पराजयाचा वायदा आहे. म्हणजे काफिरांचे हे लष्कर जे लबाडांच्या सैन्यामधून एक सैन्य आहे, जे मोठे आहे किंवा क्षुल्लक, याची मुळीच पर्वा करू नका आणि त्याची भीती बाळगू नका, पराजय हेच त्याच्या दैवांत आहे. 'हुनालिका' दूरच्या अंतराकडे इशारा आहे. जो बद्रच्या लढाईकडे किंवा मक्केच्या विजयाच्या दिवसाकडे पण असूशकतो. जेथे काफिर बोध घेण्यासारख्या पराजयांत ग्रस्त झालेत.

२) फिरऔनला मेखावाला यासाठी म्हटले की, तो जालीम जेव्हा कधी कोणावर रागवत असे तर त्याच्या हातापायांत आणि डोक्यांत, मेखा ठेकून देत असे. किंवा याचा उद्देश्य त्याचे सामर्थ्य आणि आवड आणि भक्कम सत्तेचे प्रदर्शन आहे. म्हणजे जसे मेखांनी कोण्या वस्तुला मजबूत करून दिले जाते, त्याचे भारी भरपूर सैन्य आणि त्याचे अनुयायी सुध्दा त्याच्या बादशाहीचे सामर्थ्य आणि मजबुतीला कारणीभूत होते.

३) 'ऐका' वाल्यांसाठी पहा सू. शुअरा – १७६ चा समास (भाष्य)

४) म्हणजे सूर फुंकण्याचा, ज्याने कयामत घडून येईल.

५) दूध काढणारा एका वेळी काही दूध काढून, पिलाला उंटीण किंवा गाय, म्हशीच्या जवळ सोडून देतो कारण कीं त्याच्या दूध पिण्याने स्तनांत दूध उतरून यावे म्हणून थोड्या वेळानंतर पिलाला जबरदस्तीने मागे ओढून स्वत: दूध काढणे सुरू करून देतो. हा दोन वेळा दूध काढण्याच्या दर्म्यान जे थोडा वेळ थांबून जाणे आहे, त्याला 'फवाक' म्हटले जाते. म्हणजे सूर फुंकल्यानंतर इतके सुध्दा थांबले जाणार नाहीं, किंबहुना सूर फुंकण्यालाच वेळ लागेल की, कयामतचा धरणीकंप होऊन जाईल.

६) 'कित्त'चा अर्थ आहे, वाटा– अभिप्रेत येथे कर्मपत्र किंवा हिशेब घेणे आहे. म्हणजे आमच्या कर्मपत्राप्रमाणे आमच्या वाट्याला चांगला किंवा वाईट मोबदला जो पण आहे. हिशेबाच्या दिवसाच्या येण्यापूर्वीच, आम्हास याच जगात देऊन टाक. ही 'यस्तअजिलुनका बिल अजाबी' वालीच गोष्ट आहे. हे कयामतच्या घडून येण्याला अशक्य समजून, त्यांनी उपहास व थट्टा म्हणून म्हटले.

७) हे 'अय्द' म्हणजे सामर्थ्य आणि तीव्रता. अभिप्रेत धार्मिक सामर्थ्य आणि दृढता आहे. ज्याप्रमाणे हदीस मध्ये येते ''अल्लाहला सर्वांत जास्त प्रिय नमाज, दाऊदची नमाज आणि सर्वात जास्त प्रिय उपवास, दाऊदचे उपवास आहेत. ते अर्ध्या रात्रीपर्यंत झोपत, आणि रात्रीचा एक तृतियांश भाग नमाजीत उभे रहात आणि मग त्याच्या सहाव्या भागात झोपून जात. एक दिवस उपास ठेवीत आणि एक दिवस सोडून देत आणि युध्दांत पळून जात नसत.'' (सही बुखारी)

إِنَّا سَخَّرْنَا الْجِبَالَ مَعَهُ يُسَبِّحْنَ بِالْعَشِيِّ وَالْإِشْرَاقِ ﴿١٨﴾

आम्ही पर्वतांना त्याच्या आज्ञांकित करून ठेविले होते की, सकाळ संध्याकाळ (त्याच्या बरोबर अल्लाहचे) पावित्र्य वर्णन करावे १८

وَالطَّيْرَ مَحْشُورَةً ۖ كُلٌّ لَّهُ أَوَّابٌ ﴿١٩﴾

आणि उडणारे पक्षी जमा होऊन, सर्वच्यासर्व त्याच्या आज्ञेखाली रहात.[१] १९

وَشَدَدْنَا مُلْكَهُ وَآتَيْنَاهُ الْحِكْمَةَ وَفَصْلَ الْخِطَابِ ﴿٢٠﴾

आणि आम्ही त्याच्या राज्याला मजबूत करून टाकले होते;[२] आणि त्याला शहाणपण दिले होते;[३] आणि गोष्टीचा निर्णय समजवून दिला होता.[४] २०

وَهَلْ أَتَاكَ نَبَأُ الْخَصْمِ إِذْ تَسَوَّرُوا الْمِحْرَابَ ﴿٢١﴾

आणि काय तुला वादविवाद करणाऱ्यांची पण बातमी पोहचली? जेव्हा की ते भित ओलांडून उपासनागृहात आले[५] २१

إِذْ دَخَلُوا عَلَىٰ دَاوُودَ فَفَزِعَ مِنْهُمْ ۖ قَالُوا لَا تَخَفْ ۖ خَصْمَانِ بَغَىٰ بَعْضُنَا عَلَىٰ بَعْضٍ فَاحْكُم بَيْنَنَا بِالْحَقِّ وَلَا تُشْطِطْ وَاهْدِنَا إِلَىٰ سَوَاءِ الصِّرَاطِ ﴿٢٢﴾

जेव्हां हे (हजरत) दाऊदच्या जवळ पोहचले मग हे त्यांना भिऊन गेले.[६] त्यानीं म्हटले भिऊ नका आमचे आपसातच भांडण आहे. आमच्यातून एकाने, दुसऱ्यावर अत्याचार केला आहे. तर आपण आमच्या दर्म्यान खरा खरा फैसला करून द्यावा आणि अन्याय करू नये. आणि आम्हांस सरळ मार्ग दाखवून द्यावा.[७] २२

إِنَّ هَٰذَا أَخِي لَهُ تِسْعٌ وَتِسْعُونَ نَعْجَةً وَلِيَ نَعْجَةٌ وَاحِدَةٌ فَقَالَ أَكْفِلْنِيهَا وَعَزَّنِي فِي الْخِطَابِ ﴿٢٣﴾

(ऐका!) हा माझा भाऊ आहे.[८] याच्याजवळ नव्व्यण्णव मेंढ्या आहेत. आणि माझ्याजवळ एकच आहे. परंतु हा मला सांगत आहे की, आपली ही एक सुध्दा, मलाच देऊन दे.[९] आणि माझ्यावर गोष्टींत दबाव टाकतो.[१०] २३

१) म्हणजे इशराकच्या वेळेला, आणि दिवसाच्या शेवटी पर्वत सुध्दा दाऊदांबरोबर पावित्र्य वर्णनांत दंग होत; आणि उडणारे पक्षी सुध्दा जबूरचे पठण ऐकून, हवेतच गोळा होऊन जात; आणि त्यांच्या बरोबर अल्लाहचे पावित्र्य वर्णन करीत.

२) प्रत्येक प्रकारच्या स्वाभाविक आणि आत्मिक साधनांच्या मार्फत.

३) म्हणजे पैगंबरी, योग्य मत, योग्य बोलणे, आणि चुकी शिवाय करणे

४) म्हणजे फिर्यादीचे निर्णय करण्याची क्षमता दुरदृष्टी, बुध्दी चातुर्य, आणि प्रमाणे आणणे आणि वर्णन करण्याची क्षमता.

५) महेराबने अभिप्रेत खोली आहे, जिच्यात सर्वांपासून विभक्त होऊन एकाग्र चित्ताने अल्लाहची उपासना करीत दरवाज्यावर पहारेकरी असत, कीं कोणी आत येऊन उपासनेत व्यत्यय आणू नये., वाद विवाद करणारे मागच्या बाजूने भिंत ओलांडून आत आले. (स. बुखारी, स.मुस्लिम)

६) भिण्याचे कारण ाउघड आहे की, एक तर ते दरवाज्याच्या ऐवजी, मागून भिंत चढून आत आलेत दुसरे त्यांनी एवढे मोठे पाऊल उचलून राजाची काही भीती बाळगली नाही. उघड कारणांमुळे भीतीवाल्या गोष्टींची भीती वाटणे, मनुष्याची एक स्वाभाविक प्रकृती आहे. हे पैगंबरीचे पद आणि पैगंबरीच्या कमालच्या विरूध्द नाही. तसेच एकेश्वरवादाच्याही विरूध्द नाही.

७) येणाऱ्यांनी सांत्वना केली की घाबरण्याची आवश्यकता नाही; आमच्यात एक भांडण आहे; आम्ही आपल्याकडून निर्णय करून घेण्यासाठी आलो आहोत. आपण सत्यासह निर्णय पण करून द्या, आणि सरळ मार्गाकडे आमचे मार्गदर्शन पण करा.

८) भावाने अभिप्रेत धार्मिक बंधू, किंवा कारभारातला भागीदार किंवा मित्र आहे. या सर्वांवर भावाचे संबोधन बरोबर आहे.

९) म्हणजे ही एक मेंढी पण, माझ्या मेंढ्यांत शामील करून दे कीं, मीच तिचा संरक्षक आणि मदत करणारा होऊन जावा.

१०) दुसरे भाषांतर आहे, ''आणि हा संभाषणात माझ्यावर वरचढ राहिला आहे'' म्हणजे ज्याप्रमाणे याच्या जवळ संपत्ती जास्त आहे, बोलण्यांत सुध्दा फार चतुर आहे आणि यामुळे लोकांना आपल्याकडे आकर्षित करून घेतो.

قَالَ لَقَدْ ظَلَمَكَ بِسُؤَالِ نَعْجَتِكَ إِلَىٰ نِعَاجِهِ ۖ وَإِنَّ
كَثِيرًا مِّنَ الْخُلَطَاءِ لَيَبْغِي بَعْضُهُمْ عَلَىٰ بَعْضٍ إِلَّا الَّذِينَ
آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ وَقَلِيلٌ مَّا هُمْ ۗ وَظَنَّ
دَاوُودُ أَنَّمَا فَتَنَّاهُ فَاسْتَغْفَرَ رَبَّهُ وَخَرَّ رَاكِعًا وَأَنَابَ ۩ ٢٤

आपण सांगितले, याची आपल्या मेंढ्यांबरोबर, तुझी एक मेंढी, मिळवून घेण्याची मागणी, नि:संशय एक मोठा जुलूम आहे. आणि बहुतेक हिस्सेदार आणि भागिदार (असेच असतात की) एक दुसऱ्यावर अत्याचार [१] करीत असतात; त्यांच्याशिवाय की, ज्यांनी ईमान आणले, आणि ज्यांनी सुकृत्ये केलीत; आणि असे लोक फारच थोडे आहेत. [२] आणि (हजरत) दाऊद समजून गेलेत की, आम्ही त्यांची कसोटी घेतली आहे. मग तर आपल्या पालनकर्त्याकडे क्षमा मागू लागले आणि विनयशिलता दाखवित (सजद्यांत) पडून गेलेत [३] आणि (पूर्णपणे) वळले. (२४)

فَغَفَرْنَا لَهُ ذَٰلِكَ ۖ وَإِنَّ لَهُ عِندَنَا لَزُلْفَىٰ وَحُسْنَ مَآبٍ ٢٥

मग आम्ही सुध्दा त्यांना क्षमा करून टाकले. [४] खचित्‌च ते आमच्या जवळ मोठ्या दर्जावाले आणि फार चांगल्या ठिकाणावाले (स्वर्ग) आहेत. (२५)

يَا دَاوُودُ إِنَّا جَعَلْنَاكَ خَلِيفَةً فِي الْأَرْضِ فَاحْكُم بَيْنَ النَّاسِ
بِالْحَقِّ وَلَا تَتَّبِعِ الْهَوَىٰ فَيُضِلَّكَ عَن سَبِيلِ اللَّهِ ۚ إِنَّ الَّذِينَ
يَضِلُّونَ عَن سَبِيلِ اللَّهِ لَهُمْ عَذَابٌ شَدِيدٌ بِمَا نَسُوا
يَوْمَ الْحِسَابِ ٢٦

अहो दाऊद! आम्ही तुम्हांस पृथ्वीत खलीफा बनविले आहे. तुम्ही लोकांच्या दर्म्यान, न्यायाने निवाडा करीत जा आणि आपल्या मनेच्छेचे अनुकरण करू नका. नाहीतर तो तुम्हास अल्लाहच्या मार्गावरून बहकवून टाकीन. खचित्‌च जे लोक अल्लाहच्या मार्गाहून भटकून जातात, त्यांच्याकरीता कडक शिक्षा आहेत. यासाठी की ते हिशेबाच्या दिवसाला विसरून गेलेत. (२६)

وَمَا خَلَقْنَا السَّمَاءَ وَالْأَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا بَاطِلًا ۚ ذَٰلِكَ
ظَنُّ الَّذِينَ كَفَرُوا ۚ فَوَيْلٌ لِّلَّذِينَ كَفَرُوا مِنَ النَّارِ ٢٧

आणि आम्ही आकाश आणि पृथ्वी, आणि त्यांच्या दर्म्यानच्या वस्तुंना मिथ्या निर्माण केले नाही. [५] ही कल्पना तर काफिरांची आहे तर काफिरांकरीताआगीची खराबी आहे. (२७)

أَمْ نَجْعَلُ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ كَالْمُفْسِدِينَ
فِي الْأَرْضِ أَمْ نَجْعَلُ الْمُتَّقِينَ كَالْفُجَّارِ ٢٨

काय आम्ही त्या लोकांना, ज्यांनी ईमान आणले व सुकृत्ये केली त्यांच्या समान करुन टाकू, जे (नेहमी) देशात फिसाद फैलावित राहिले किंवा अल्लाहला भिऊन चालणाऱ्यांना दुराचरणी लोकांसारखेच करुन टाकू? (२८)

كِتَابٌ أَنزَلْنَاهُ إِلَيْكَ مُبَارَكٌ لِّيَدَّبَّرُوا آيَاتِهِ وَلِيَتَذَكَّرَ أُولُو
الْأَلْبَابِ ٢٩

हे प्राासादिक पुस्तक ज्याला आम्ही आपल्याकडे याकरिता अवतरीत केले आहे की, लोकांनी याच्या महावाक्यांवर चिंतन व मनन करावे आणि बुध्दीमतांनी यापासून बोध घ्यावा. (२९)

وَوَهَبْنَا لِدَاوُودَ سُلَيْمَانَ ۚ نِعْمَ الْعَبْدُ ۖ إِنَّهُ أَوَّابٌ ٣٠

आणि आम्ही दऊदला सुलैमान (नामी मुलगा) प्रदान केला, जो फार चांगला सेवक होता आणि फारच (आमच्याकडे) वळणारा होता. (३०)

إِذْ عُرِضَ عَلَيْهِ بِالْعَشِيِّ الصَّافِنَاتُ الْجِيَادُ ٣١

जेव्हा त्याच्या समोर संध्याकाळच्या वेळी, जलद चालणारे (खास पागेतील) घोडे, सादर केले गेले. [६] (३१)

فَقَالَ إِنِّي أَحْبَبْتُ حُبَّ الْخَيْرِ عَن ذِكْرِ رَبِّي حَتَّىٰ
تَوَارَتْ بِالْحِجَابِ ٣٢

तेव्हा म्हणू लागले मी, आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणावर, या घोड्यांच्या प्रेमाला, प्राधान्य दिले, येथ पावेतो की, (सूर्य) अस्ताला गेला. (३२)

१) म्हणजे मनुष्यांमध्ये ही कोताई सर्वसाधारण आहे की, एक भागीदार दुसऱ्यावर अत्याचार करतो; आणि प्रयत्न करतो की, त्यांने दुसऱ्याचा वाटा पण हडप करून घ्यावा.

२) तथापि या चारित्र्यविषयक कोताईपासून ईमानवाले सुरक्षित आहेत. कारण की, त्यांच्या मनात अल्लाहचे भय असते. आणि ते सुकृत्य करण्याला बांधलेले असतात. म्हणून कोणावर अत्याचार करणे, आणि कोणाची संपत्ती हडप

करून टाकण्याचा प्रयत्न करणे, त्यांच्या प्रकृतीत शामील नसते. ते तर देणारे असतात, घेणारे नसतात. परंतु, अशा उच्च चारित्र्याचे लोक फारच थोडे असतात.

३) 'व खर्र राकिअन्' चा अर्थ या ठिकाणी सजद्यात पडून जाणे आहे.

४) ह. दाऊद عليه السلام चे हे काम काय होते, ज्यावर त्यांना कोताई, तौबा करणे आणि पश्चात्तापाची जाणीव झाली; आणि अल्लाह्ने त्यांना क्षमा करून टाकले. कुरआन करीममध्ये या कारणांचा तपशील नाहीं. आणि सनदशीर हदीसमध्ये सुध्दा, याच्या बाबतीत कोणी खुलासा नाहीं. म्हणून काही भाष्यकारांनी तर इस्राईली रिवायतीला आधार बनवून अशा गोष्टी पण लिहून टाकल्या आहेत, ज्या एका पैगंबराच्या शान मध्ये फारच कमी दर्जाच्या आहेत. काही भाष्यकार उदाहरणार्थ इब्ने कसीर ने खामोशी ठेवली आहे की जेव्हा कुरआन आणि हदीस या मामल्यांत स्तब्ध आहेत, तर आम्हाला सुध्दा याच्या तपशीलांत जाण्याची काही आवश्यकता नाही. भाष्यकारांचा एक तिसरा गट आहे जो या घटनेचे काही बारकावे आणि तपशील वर्णन करतो. कारण की, कुरआनाच्या या संक्षिप्त सांगण्याचे काही स्पष्टीकरण होऊन जावे. तथापि हे कोण्या एका गोष्टीवर समविचारी नाहीत. काही म्हणतात, ह. दाऊद عليه السلام नी एका सैनिकाला हुकूम दिला होता की, त्याने आपल्या पत्नीला तलाक द्यावा. आणि ही त्या काळातील वहीवाटीमध्ये दोषपूर्ण गोष्ट नव्हती. ह. दाऊद عليه السلام ला त्या स्त्रीच्या खुब्या आणि कमाली ठाऊक झाल्या होत्या. ज्याच्या आधारावर, त्यांच्यात ही इच्छा निर्माण झाली की, या स्त्रीला राणी व्हावयास पाहिजे, न की, एक सर्वसाधारण स्त्री. कारण की, तिच्या खुब्या आणि कमालींनी सारा देश लाभान्वयीत व्हावा, ही इच्छा कितीही चांगल्या भावनेवर आधारित असली, परंतु एक तर, अनेक पत्नींच्या उपस्थितीत, ही अयोग्यशी गोष्ट वाटते. दुसरे त्या वेळच्या बादशाहकडून, असे जाहीर करण्यात जोर जबरदस्तीचा भाग पण शामील होतो. म्हणून ह. दाऊद عليه السلام ला एका, उपमात्मक घटनेने, हे अयोग्य असल्याची जाणीव करुन दिली गेली. आणि त्यांना खरोखर, यावर तंबी होऊन गेली. काही म्हणतात की, येणारी ही दोन माणसे देवदूत होती. जे एक काल्पनिक फिर्याद घेऊन हजर झालेत. ह. दाऊद عليه السلام कडून कोताई ही झाली की, दावेदाराची गोष्ट ऐकूनच आपल्या मताचे प्रदर्शन करुन टाकले. आणि ज्याच्यावर दावा केला गेला आहे त्याची गोष्ट ऐकून घेण्याची आवश्यकताच त्यांना भासली नाही. अल्लाह्तआलाने त्यांचे दर्जे वाढविण्यासाठी या परीक्षेत त्यांना टाकले; या चुकीची जाणीव होताच ते समजून गेले की, ही परीक्षा होती. जी अल्लाहकडून त्यांची घेण्यात आली आणि ते अल्लाहकडे वळले. काही म्हणतात की, येणारे देवदूत नव्हते, मनुष्यच होते. आणि ही काल्पनिक घटना नाही. एक खरोखर भांडण होते, ज्याच्या फैसल्यासाठी ते आले होते. आणि अशा प्रकारे त्यांच्या सहनशिलतेची परीक्षा घेण्यात आली. कारण की या घटनेत सहन न करण्यासारखे आणि स्वाभाविक भडकून उठण्याचे अनेक पैलू होते. एक तर परवानगी शिवाय भिंत ओलांडून येणे, दुसरे उपासनेच्या खास वेळेत येऊन दखल देणे, तिसरे, त्यांची बोलण्याची पध्दत पण त्यांच्या सत्ताधिशाच्या शानच्या विरुध्द होती. (की, अत्त्याचार न करणे वगैरे) परंतु अल्लाहने आपणास सुबुध्दी दिली की, क्रोधित झाले नाहीत आणि सहनशिलतेच्या कमालीचे प्रदर्शन केले. परंतु मनात जी स्वाभाविक नाराजीची जाणीव पण निर्माण झाली इला पण ''हसनातुल अबरार, सैय्यातुल मुकर्रबीन'' च्या अंतर्गत, आपली कोताई समजली. म्हणजे ही अल्लाहकडून कसोटी होती. म्हणून हे स्वाभाविक संकोचणे पण व्हावयास पाहिजे नव्हते, ज्यावर त्यांनी पश्चात्ताप व्यक्त केला आणि क्षमा मागितली. वल्लाह् अअलम् बिस्सवाब!

५) किंबहुना एका खास उद्देशाने निर्माण केला आहे. आणि तो हा की, माझ्या सेवकांनी माझी उपासना करावी. जो असे करील, त्याला मी उत्कृष्ट मोबदला बहाल करीन. आणि माझ्या उपासना आणि आज्ञापालनापासून तोंड फिरवील, त्याच्यासाठी नरकाग्नीची शिक्षा आहे.

६) साफिनात, साफिन किंवा साफिना चे अनेक वचन आहे. ते घोडे जे तीन पायांवर उभे असतात. जियाद, जवाद चे अनेकवचन आहे. जे अति वेगवान धावणाऱ्या घोड्याला म्हणतात. म्हणजे ह. सुलैमान عليه السلام नी जिहादसाठी जे घोडे पाळलेले होते, ते उमदा, असिल, जल्द धांवणारे, ह. सुलैमान عليه السلام वर पहाणी करीता सादर केले गेले. 'आशिय्यी' जुहर किंवा असरपासून दिवसाच्या शेवटच्या वेळेला म्हणतात. ज्याला आम्ही संध्याकाळ म्हणतो.

رُدُّوْهَا عَلَيَّ ۚ فَطَفِقَ مَسْحًا بِالسُّوْقِ وَالْاَعْنَاقِ ﴿٣٣﴾

**यांना (घोड्यांना) दुसऱ्यादा माझ्या समोर आणा. मग तर पोटऱ्या आणि मानांवर हात फिरविणे सुरु करुन दिले.** [१] ३३

وَلَقَدْ فَتَنَّا سُلَيْمٰنَ وَاَلْقَيْنَا عَلٰى كُرْسِيِّهٖ جَسَدًا ثُمَّ اَنَابَ ﴿٣٤﴾

**आणि आम्ही सुलैमानची परीक्षा घेतली. आणि त्याच्या सिंहासनावर एक धड टाकून दिले. मग** [२] **तो आमच्याकडे वळला.** ३४

قَالَ رَبِّ اغْفِرْ لِيْ وَهَبْ لِيْ مُلْكًا لَّا يَنْۢبَغِيْ لِاَحَدٍ مِّنْۢ بَعْدِيْ ۚ اِنَّكَ اَنْتَ الْوَهَّابُ ﴿٣٥﴾

**त्याने म्हटले की, हे माझ्या पालनकर्त्या! मला क्षमा कर. आणि मला असे राज्य प्रदान कर, जे माझ्याशिवाय कोण्या मनुष्याकरिता योग्य नसावे.** [३] **तू मोठाच दाता आहेस.** ३५

فَسَخَّرْنَا لَهُ الرِّيْحَ تَجْرِيْ بِاَمْرِهٖ رُخَآءً حَيْثُ اَصَابَ ﴿٣٦﴾

**मग आम्ही वाऱ्याला त्याच्या अधिन करुन दिले. तो त्यांच्या हुकमाने, जेथे ते इच्छीत तेथे नरमीने पोहचवून देत असे.** [४] ३६

وَالشَّيٰطِيْنَ كُلَّ بَنَّآءٍ وَّغَوَّاصٍ ﴿٣٧﴾

**आणि (सशक्त) जिन्नांना पण (त्यांच्या आज्ञांकित करुन दिले.) प्रत्येक इमारत बनविणाऱ्याला आणि समुद्रात सूर मारणाऱ्यांना** ३७

وَّاٰخَرِيْنَ مُقَرَّنِيْنَ فِي الْاَصْفَادِ ﴿٣٨﴾

**आणि दुसऱ्या जिन्नांना पण जे साखळ दंडात जकडलेले असत.** [५] ३८

هٰذَا عَطَآؤُنَا فَامْنُنْ اَوْ اَمْسِكْ بِغَيْرِ حِسَابٍ ﴿٣٩﴾

**ही आहे आमची देणगी, आता तू उपकार कर किंवा रोकून ठेव काही हिशेब नाही.** [६] ३९

وَاِنَّ لَهٗ عِنْدَنَا لَزُلْفٰى وَحُسْنَ مَاٰبٍ ﴿٤٠﴾

**त्यांच्या करिता आमच्या जवळ मोठा जवळीकीचा मर्तबा आहे; आणि फार चांगले ठिकाण आहे.** [७] ४०

وَاذْكُرْ عَبْدَنَآ اَيُّوْبَ ۘ اِذْ نَادٰى رَبَّهٗٓ اَنِّيْ مَسَّنِيَ الشَّيْطٰنُ بِنُصْبٍ وَّعَذَابٍ ﴿٤١﴾

**आणि आमचा सेवक अय्यूबचा (पण) उल्लेख कर; जेव्हा की त्याने आपल्या पालनकर्त्यास हाक मारुन सांगितले कीं, मला शैतानाने क्लेश आणि दु:ख पोहचविले आहे.** [८] ४१

اُرْكُضْ بِرِجْلِكَ ۚ هٰذَا مُغْتَسَلٌۢ بَارِدٌ وَّشَرَابٌ ﴿٤٢﴾

**आपला पाय मारा. हे आंघोळीचे थंड आणि गोड पाणी आहे.** [९] ४२

وَوَهَبْنَا لَهٗٓ اَهْلَهٗ وَمِثْلَهُمْ مَّعَهُمْ رَحْمَةً مِّنَّا وَذِكْرٰى لِاُولِي الْاَلْبَابِ ﴿٤٣﴾

**आणि आम्ही त्याला पूर्ण कुटुंब प्रदान केले; किंबहुना एवढेच आणखी सुध्दा याच्या बरोबर आपल्या (खास) दयेने;** [१०] **आणि जे बुध्दी बाळगतात त्यांच्या करितां एक बोध म्हणून.** [११] ४३

१) भावार्थ, होईल की, घोड्यांच्या पाहणीत ह. सुलैमान عليه السلام ची असरची नमाज किंवा खास वजीफा, राहून गेला जो यावेळी ते करीत असत. ज्यावर त्यांना फारच दु:ख झाले. आणि म्हणू लागले की, मी घोड्याच्या प्रेमात इतका मशगुल आणि दंग होऊन गेलो की, सूर्य पश्चिमेच्या पडद्याआड लपून गेला आणि मी अल्लाहचे स्मरण, नमाज किंवा वजीफ्याला विसरून गेलो. म्हणून याची भरपाई आणि निर्सनाकरिता, त्यांनी सर्व घोडे अल्लाहच्या मार्गात ठार करुन टाकले. इमाम शौकानी आणि इब्ने कसीर वगैरेंनी या भाष्याला प्राधान्य दिले आहे. दुसऱ्या काही भाष्यकारांनी, याचे दुसरे भाष्य केले आहे. त्याच्या अनुषंगाने, 'अन्', 'अज्ल'च्या अर्थात आहे. म्हणजे पालनकर्त्याच्या स्मरणामुळे, मी या घोड्यांवर प्रेम करतो. म्हणजे यांच्या मार्फत अल्लाहच्या मार्गात जिहाद होते. मग या घोड्यांना पळविले, येथपावेतो की ते दृष्टी आड होऊन गेले. त्यांना पुन्हा दुसऱ्यांदा बोलाविले आणि प्रेमाने त्यांच्या पोटऱ्यांवर आणि मानेवर हात फिरविणे सुरु करुन दिले. 'खैर' कुरआनामध्ये संपत्तीच्या अर्थात वापरण्यात आला आहे. येथे हा शब्द घोड्यांकरिता आला आहे. तवारत्चा मर्जा घोडे आहेत. इमाम इब्ने जरीर तबरीने, या दुसऱ्या भाष्याला प्राधान्य दिले आहे. आणि हेच भाष्य, वेगवेगळ्या कारणांनी बरोबर वाटते. वल्लाहु अअ्लम!

२) ही परीक्षा काय होती, सिंहासनावर टाकण्यात आलेले धड कशाचे होते? आणि याचा अर्थ काय आहे? याचा पण काही तपशील, कुरआन करीम किंवा हदीसमध्ये मिळत नाही. तथापि काही भाष्यकारांनी, सहीह हदीसने सिध्द एका घटनेला यावर लागू केले आहे. आणि ती ही आहे की, ह. सुलैमान عليه السلام नी एका वेळी सांगितले की, मी आजच्या रात्री

आपल्या सर्व पत्नींशी, (ज्याची संख्या ७० किंवा ९० होती) शय्यासोबत करीन कारण की त्यांच्यापासून, घोडस्वारीत निष्णात, जन्माला यावेत, ज्यांनी अल्लाह्च्या मार्गात जिहाद करावे आणि यावर इन्शा अल्लाह म्हटले नाही. (म्हणजे आपल्याच युक्तीवर पूर्ण भरोसा केला) परिणामी असे झाले की, एका पत्नी शिवाय कोणी गर्भवती झाली नाही. आणि गर्भवती पत्नीने पण ज्या मुलाला जन्म दिला तो अपूर्ण म्हणजे अर्धाच होता. नबी ﷺ नी फर्माविले जर सुलैमान इन्शा अल्लाह् म्हणून घेते, तर सर्वांपासून योध्दे जन्माला आले असते. (स. बुखारी, स मुस्लीम) या भाष्यकारांच्या विचारांत कदाचित् इन्शा अल्लाह् न म्हणणे किंवा फक्त आपल्या युक्तीवर भरोसा करणे, हाच फित्ना असावा. ज्यांच्यात ह. सुलैमान عليه السلام ग्रस्त झाले आणि सिंहासनावर टाकले गेलेले शरीर हेच अपूर्ण अर्धवट मूल असावे. वल्लाह् अअ्लम!

३) म्हणजे घोडेस्वारांची फौज निर्माण होण्याची आकांक्षा, तुझ्या इच्छा आणि मर्जीच्या अंतर्गत पूर्ण झली नाही; परंतु जर मला असे अधिकार संपन्न राज्य प्रदान करून दे कीं, तसे राज्य माझ्या शिवाय, माझ्या नंतर कोणाजवळ नसावे. तर मग संततीची आवश्यकताच राहणार नाही. ही प्रार्थना पण अल्लाह्च्या धर्माच्या वर्चस्वासाठीच होती.

४) म्हणजे आम्ही सुलैमानची ही प्रार्थना मान्य करून टाकली आणि असे राज्य प्रदान केले, ज्यात वारा पण त्यांच्या अधिन होता. येथे वाऱ्याला नरमीने चालणारा दाखविला आहे. जेव्हा की दुसऱ्या ठिकाणी त्याला सोसाट्याचा म्हटले आहे. (सू.अंबिया-८१) ज्याचा अर्थ हा आहे कीं वाऱ्यामध्ये नैसर्गिकरित्या सोसाट्याचे वाहणे असते. परंतु सुलैमान करीता त्याला नरम करून दिला; किंवा कधी झुळझुळ वाहणारा, तर कधी सोसाट्याचा ज्याप्रमाणे ह. सुलैमान عليه السلام इच्छीत. (फत्हुल कदीर)

५) जिन्नामधून जे शिरजोर किंवा काफिर होते, त्यांना बेड्यात जकडून टाकण्यांत येत असे कारण की त्यांनी आपल्या कुफ्र किंवा शिरजोरी मुळे डोके वर उचलू शकू नये.

६) म्हणजे आम्ही तुझ्या प्रार्थनेप्रमाणे तुला महान, शानदार राज्य अर्पण केले आहे. आता मनुष्यांमधून ज्याला तू इच्छीशील त्याला दे, ज्याला इच्छीशील देऊ नकोस. तुझ्याजवळून आम्ही हिशेब पण घेणार नाही.

७) म्हणजे ऐहीक उच्च पद आणि मर्तबा प्रदान करून सुध्दा, परलोकांत पण, ह सुलैमान عليه السلام ला जवळीक आणि खास स्थान प्राप्त होईल.

८) ह. अय्यूब عليه السلام चे आजारपण, आणि याच्यात त्यांचे सहन करणे मशहूर आहे. ज्याच्या प्रमाणे अल्लाह्तआलाने कुटुंबीय आणि संपत्तीची हानी आणि आजारपणाच्या मार्फत त्यांची कसोटी पाहिली ज्याच्यात ते कित्येक वर्षे ग्रस्त राहिलेत. येथ पावेतो की फक्त एक पत्नी त्यांच्या बरोबर राहून गेली. जी सकाळ सांज त्यांची सेवा पण करी; आणि त्यांनी सांगितलेली कामे करून, यथाशक्ती पोटापाण्याची व्यवस्था पण करी, परंतु यातून किती खरे आहे आणि किती नाहीं, त्याला माहित करून घेण्याचा काही सनदशीर मार्ग नाही. 'नुस्ब' ने शारीरिक त्रास , आणि शिक्षेने आर्थिक विपन्नावस्था, अभिप्रेत आहे. याचा संबंध शैतानाशी यासाठी जोडला गेला. वास्तविक सर्व काही करणारा फक्त अल्लाह्च आहे कीं शक्य आहे शैतानाचे वसवसेच कोण्या अशा कर्माला कारणीभूत झाले असतील ज्यावर ही कसोटी घेण्यात आली. किंवा मग आदर म्हणून आहे कीं, भलाईला अल्लाह्तआलाकडे आणि वाईटाला आपल्याकडे किंवा शैतानाकडे संबंधित केले जाते.

९) अल्लाह्तआलाने ह. अय्यूब عليه السلام ची प्रार्थना मान्य केली आणि त्यांना सांगितले कीं, जमिनीवर पाय मारा. ज्यांने एक झरा वाहू लागला. याचे पाणी प्याल्याने आतील आजार आणि त्याच्या पाण्याने आंघोळ केल्याने बाहेरचे आजार, दूर होऊन गेलेत. काही म्हणतात कीं हे दोन झरे होते. एकाने आंघोळ केली आणि दुसऱ्याचे पाणी प्याले. परंतु कुरआनाच्या गोष्टीने पहिल्याचे समर्थन होते. म्हणजे एकच झरा होता.

१०) काही म्हणतात की पहिले कुटुंबीय, जे कसोटी म्हणून गारद करून टाकले होते. त्यांना जिवंत करून टाकण्यात आले. आणि यांच्याच सारखे आणखी कुटुंबीय बहाल करण्यात आले. परंतु ही गोष्ट कोण्या सनदशीर साधनाने सिध्द नाही. जास्त बरोबर गोष्ट हीच वाटते की, अल्लाह्ने पहिल्यापेक्षा जास्त संतती आणि संपत्ती त्यांना बहाल केली; जी पूर्वी पेक्षा दुप्पट होती.

११) म्हणजे अय्यूब عليه السلام ला हे सर्व काही आम्ही दुसऱ्यादा प्रदान केले, तर आपल्या खास दयेच्या प्रदर्शनाशिवाय, याचा दुसरा उद्देश्य हा आहे की, बुध्दीवंतांनी यापासून बोध घ्यावा. आणि त्यांनी पण संकटे आणि अडी अडचणीत सहन करावे, जसे ह. अय्यूब عليه السلام नी केले.

وَخُذۡ بِيَدِكَ ضِغۡثًا فَاضۡرِبۡ بِّهٖ وَلَا تَحۡنَثۡ ؕ اِنَّا وَجَدۡنٰهُ صَابِرًا ؕ نِعۡمَ الۡعَبۡدُ ؕ اِنَّهٗۤ اَوَّابٌ ﴿۴۴﴾

**आणि आपल्याच हातात एक काड्यांची (झाडू घेऊन) मारून दे आणि शपथ मोडू नकोस.[1] खरे तर हे आहे की, आम्ही त्याला मोठा सहनशील सेवक पावलो. तो मोठा सदाचरणी सेवक होता. आणि मोठाच आमच्या कडे वळणारा. (४४)**

وَاذۡكُرۡ عِبٰدَنَاۤ اِبۡرٰهِيۡمَ وَاِسۡحٰقَ وَيَعۡقُوۡبَ اُولِى الۡاَيۡدِىۡ وَالۡاَبۡصَارِ ﴿۴۵﴾

**आणि आमचे सेवक इब्राहीम, इस्हाक (अ.) आणि याकूब चा पण लोकांजवळ उल्लेख कर, जे हातांनी आणि डोळ्यांनी संपन्न होते.[2] (४५)**

اِنَّاۤ اَخۡلَصۡنٰهُمۡ بِخَالِصَةٍ ذِكۡرَى الدَّارِ ﴿۴۶﴾

**आम्ही त्यांना एक विशेष गोष्ट म्हणजे पारलौकिक स्मरणासाठी निवडले होते.[3] (४६)**

وَاِنَّهُمۡ عِنۡدَنَا لَمِنَ الۡمُصۡطَفَيۡنَ الۡاَخۡيَارِ ﴿۴۷﴾

**हे सर्व आमच्या जवळ निवडलेले आणि उत्तम लोक होते. (४७)**

وَاذۡكُرۡ اِسۡمٰعِيۡلَ وَالۡيَسَعَ وَذَا الۡكِفۡلِ ؕ وَكُلٌّ مِّنَ الۡاَخۡيَارِ ﴿۴۸﴾

**इस्माईल, यसआ आणि जुलकिफ्ल यांचा पण उल्लेख करा हे सर्व पुण्यशील लोक होते.[4] (४८)**

هٰذَا ذِكۡرٌ ؕ وَاِنَّ لِلۡمُتَّقِيۡنَ لَحُسۡنَ مَاٰبٍ ﴿۴۹﴾

**हा एक बोध आहे, आणि लक्षात ठेवा, की, अल्लाह्ला भिऊन वागणाऱ्यांसाठीं, फार चांगले ठिकाण आहे. (४९)**

جَنّٰتِ عَدۡنٍ مُّفَتَّحَةً لَّهُمُ الۡاَبۡوَابُ ﴿۵۰﴾

**(म्हणजे नित्याच्या) स्वर्गाच्या बागा, ज्यांचे दरवाजे त्यांच्यासाठी उघडलेले आहेत. (५०)**

مُتَّكِـِٕيۡنَ فِيۡهَا يَدۡعُوۡنَ فِيۡهَا بِفَاكِهَةٍ كَثِيۡرَةٍ وَّشَرَابٍ ﴿۵۱﴾

**जेथे तक्के लाऊन ऐस पैस बसलेले असतील आणि पुष्कळ मेवे, आणि अनेक प्रकारची मद्ये मागवत असतील (५१)**

وَعِنۡدَهُمۡ قٰصِرٰتُ الطَّرۡفِ اَتۡرَابٌ ﴿۵۲﴾

**आणि त्यांच्या जवळ नजर खाली ठेवणाऱ्या, समवयस्क सुंदर अप्सरा असतील[5] (५२)**

هٰذَا مَا تُوۡعَدُوۡنَ لِيَوۡمِ الۡحِسَابِ ﴿۵۳﴾

**या आहेत (त्या देणग्या) ज्यांचा वायदा तुमच्याशी हिशेबाच्या दिवसासाठी केला जात होता. (५३)**

१) आजारपणाच्या दिवसांत सेवा करणाऱ्या पत्नीला, कोण्या गोष्टीवर नाराज होऊन ह. अय्यूब عليه السلام नी तिला शंभर कोडे मारण्याची शपथ खाल्ली होती. तंदुरस्त झाल्यानंतर, अल्लाहतआलाने फर्माविले, शंभर काड्या असलेल्या झाडूने तिला एकदा मार, तुझी शपथ पूर्ण होऊन जाईल. या हुकूमांत धर्मपंडीतात मतभेद आहे कीं, ही सूट फक्त ह. अय्यूब عليه السلام साठीच खास आहे. किंवा दुसरा कोणी मनुष्य, पण याच प्रमाणे शंभर कोड्यांच्या ऐवजी, शंभर काड्यांवाली झाडू मारून, शपथ तोडण्यापासून वाचू शकतो? काही पहिल्या मताशी सहमत आहे. आणि काही म्हणतात की जर नियत मोठ्या माराची केली नसेल, तर अशा प्रकारे अंमल केला जाऊ शकतो. (फत्हुल कदीर) एका हदीशीने ठाऊक होते की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम नी सुध्दा एका अपंग दुर्बल व्याभिचाऱ्याला , शंभर कोड्यांच्या जागी, शंभर काड्यांवाली झाडू मारून शिक्षा दिली. (मुसनद अहमद २२२/५, इब्ने माजा) ज्यामुळे विशिष्ट, प्रसंगी याचा उपयोग करणे सिध्द होते.

२) म्हणजे अल्लाह्च्या उपासना आणि धर्माच्या मदतीत मोठे मजबुत आणि धार्मिक व ज्ञानिक दुरदष्टी मध्ये अव्दितीय होते. काही म्हणतात कीं, हे 'अय्दी' 'निअम्' च्या अर्थांत आहे. म्हणजे हे ते लोक आहेत, ज्यांच्यावर अल्लाह्चे खास इनाम आणि उपकार झालेत. किंवा हे लोकांवर उपकार करणारे होते.

३) म्हणजे आम्ही त्यांना परलोकाच्या स्मरणासाठी निवडून घेतले होते. म्हणून परलोक नेहमी त्यांच्या डोळ्या समोर असे (परलोकाची प्रत्येक वेळी आठवण, ही पण अल्लाह्ची मोठी देणगी आणि परहेज गारी आणि ईशभयाचा आधार आहे.) किंवा ते लोकांना परलोक आणि अल्लाह्कडे बोलविण्यात प्रयत्नशील असत.

४) यसआ,म्हणतात ह. इलियासचे वारसदार होते. 'जुल्किफ्ल' करीता पहा, सू.अंबिया आ. ८५ चे भाष्य.

५) म्हणजे ज्यांच्या नजरा आपल्या पतींशी नजर भिडविणाऱ्या नसतील. अतराब तिर्बचे अनेकवचन आहे. समवयस्क किंवा ज्यांच्या रूप सौंदर्याला कधीही उतरती कळा लागणार नाही, अशा (फत्हुल कदीर)

اِنَّ هٰذَا لَرِزْقُنَا مَا لَهٗ مِنْ نَّفَادٍ ﴿٥٤﴾

**नि:संशय या अन्न संपत्ती, (खास) आमच्या देणग्या आहेत. ज्या कधी संपणारच नाहीं.[१] (५४)**

هٰذَا ؕ وَاِنَّ لِلطّٰغِيْنَ لَشَرَّ مَاٰبٍ ﴿٥٥﴾

**हा तर झाला मोबदला;[२] (लक्षात ठेवा की) शिरजोरांसाठी[३] फार वाईट जागा आहे. (५५)**

جَهَنَّمَ ۚ يَصْلَوْنَهَا ۚ فَبِئْسَ الْمِهَادُ ﴿٥٦﴾

**नरकाग्नी आहे, ज्यांत ते जातील (अरेरे) किती वाईट अंथरूण आहे. (५६)**

هٰذَا فَلْيَذُوْقُوْهُ حَمِيْمٌ وَّغَسَّاقٌ ﴿٥٧﴾

**हे आहेत, मग याला चाखा गरमपाणी आणि पू.[४] (५७)**

وَّاٰخَرُ مِنْ شَكْلِهٖٓ اَزْوَاجٌ ﴿٥٨﴾

**आणि काही अशाच प्रकारच्या, तऱ्हेतऱ्हेच्या वस्तू.[५] (५८)**

هٰذَا فَوْجٌ مُّقْتَحِمٌ مَّعَكُمْ ۚ لَا مَرْحَبًا بِهِمْ ؕ اِنَّهُمْ صَالُوا
النَّارِ ﴿٥٩﴾

**हा एक लोक समुदाय आहे, जो तुमच्याबरोबर (नरकाग्नीत) जाणार आहे.[६] त्यांच्यासाठी आनंद आणि विपुलता न राहो.[७] हेच तर नरकाग्नीत जाणारे आहेत.[८] (५९)**

قَالُوْا بَلْ اَنْتُمْ ۣ لَا مَرْحَبًا بِكُمْ ؕ اَنْتُمْ قَدَّمْتُمُوْهُ لَنَا ۚ
فَبِئْسَ الْقَرَارُ ﴿٦٠﴾

**ते म्हणतील, की, तुम्ही असाल की तुम्हाला आनंद न होवो. तुम्हीच तर याला पहिल्यापासून आमच्यासमोर आणून ठेवले होते.[९] हे तर रहाण्याचे फार वाईट ठिकाण आहे. (६०)**

قَالُوْا رَبَّنَا مَنْ قَدَّمَ لَنَا هٰذَا فَزِدْهُ عَذَابًا ضِعْفًا
فِي النَّارِ ﴿٦١﴾

**ते म्हणतील हे आमच्या पालनकर्त्या! ज्याने (कुफ्रची रीत) आमच्या करिता पहिलेच काढली असेल,[१०] त्याच्यासाठी नरकाग्नीची दुप्पट शिक्षा[११] करून दे. (६१)**

१) रिज्क, देणगीच्या अर्थात आहे. आणि हाजाने प्रत्येक प्रकारच्या देणग्या, आणि तो आदर सन्मान अभिप्रेत आहे, जो स्वर्गवासींना प्राप्त होईल. नफाद चा अर्थ कापलेला आणि शेवटचा आहे. या देणग्या पण कधीच न संपणाऱ्या असतील, आणि आदर सन्मान पण कायम स्वरुपाचा.

२) म्हणजे चर्चित भलाईवाल्यांचा मामला झाला. याच्यानंतर वाईट लोकांच्या परिणामाचे वर्णन केले जात आहे.

३) 'तागीन' ज्यांनी अल्लाहच्या हुकुमांशी शिरजोरी, आणि पैगंबरांना खोटे ठरविले. 'यस्लौना' चा अर्थ आहे, 'यद्खुलुना' प्रवेश करतील.

४) 'हमीम व गस्साक' हाजाची खबर आहे. म्हणजे हे आहे गरम पाणी आणि पूं; याला चाखा. 'हमीम' गरम उकळते पाणी, जे याच्या आतड्यांना कापून टाकेल. 'गस्साक' नरक्वासियांच्या चामडींतून जो पूंआणि घाणेरडे रक्त निघेल किंवा अती शीत पाणी, ज्याचे पिणे फारच कठीण होईल.

५) 'शकलिही' याच्यासारखे. 'अजवाज' म्हणजे नाना प्रकार. म्हणजे हमीम व गस्साकसारख्या आणखी अनेक प्रकारच्या शिक्षा होतील.

६) नरकाग्नीच्या दरवाज्यांवर उभे असलेले देवदूत, कुफ्रच्या पेशव्यांना, आणि बहकलेल्यांच्या पुढाऱ्यांना म्हणतील, जेव्हा अनुयायी प्रकारातील काफिर नरकाग्नीत जातील. किंवा कुफ्र आणि बहकलेल्यांचे पेशवे, आपसात ही गोष्ट, अनुयायांकडे इशारा करुन म्हणतील.

७) हे पुढारी, नरकाग्नीत दाखल होणाऱ्या काफिरांकरता, देवदुतांच्या उत्तरात किंवा आपसात म्हणतील. 'रहब'चा अर्थ आहे विस्तृतता आणि रेल चेलचा आहे. मरहबा हे शब्द तरहीब म्हणजे शुभचिंतन आहे, जे येणाऱ्या पाहुण्यांच्या स्वागतासाठी म्हणण्यात येतात. 'ला मरहबा' याच्या उलट आहे.

८) हे यांचे स्वागत न करण्याचे कारण आहे. म्हणजे यांच्यात आणि आमच्या दर्म्यान काही वेगळे असण्याचे कारण नाही; हे पण आमच्याच प्रमाणे नरकाग्नीत दाखल होत आहेत. आणि ज्याप्रमाणे आम्ही शिक्षेस पात्र ठरलो आहोत, त्याचप्रमाणे हे सुध्दा शिक्षेला पात्र ठरत आहेत.

९) म्हणजे तुम्हीच, कुफ्र आणि अज्ञानाच्या मार्गाला, सुशोभित करुन आमच्यासमोर सादर करीत होता. अशाप्रकारे या नरकाग्नीच्या शिक्षेला सादरकर्ते तर तुम्हीच आहात. हे अनुयायी, आपल्या पुढाऱ्यांना म्हणतील.

१०) म्हणजे ज्यांनी आम्हाला कुफ्रचे आवाहन केले, आणि याला सत्य आणि पुण्य म्हणून सांगितले किंवा ज्यांनी आम्हाला कुफ्रकडे बोलावून, आमच्यासाठी ही शिक्षा पुढे पाठवली.

११) ही तीच गोष्ट आहे जिला आणखी कित्येक ठिकाणी सांगण्यात आले आहे. उदाहरणार्थ सू. अअ्राफ- ३८, सू. अहजाब ६८

وَقَالُوا مَا لَنَا لَا نَرَىٰ رِجَالًا كُنَّا نَعُدُّهُم مِّنَ الْأَشْرَارِ ﴿٦٢﴾

आणि नर्कवासी म्हणतील की काय गोष्ट आहे की, ते लोक आम्हांस दिसत नाहीत, ज्यांची आम्ही वाईट लोकांत गणती करीत होतो.[१] ६२

أَتَّخَذْنَاهُمْ سِخْرِيًّا أَمْ زَاغَتْ عَنْهُمُ الْأَبْصَارُ ﴿٦٣﴾

काय आम्हीच त्यांची थट्टा करीत होतो [२] किंवा आमच्या नजरा त्यांच्यापासून वळून गेल्या.[३] ६३

ع ٤ ٢٤ ١٣

إِنَّ ذَٰلِكَ لَحَقٌّ تَخَاصُمُ أَهْلِ النَّارِ ﴿٦٤﴾

४ २४ १३

खात्री बाळगा की, नर्कवासियांचे हे भांडण आवश्यच होईल.[४] ६४

قُلْ إِنَّمَا أَنَا مُنذِرٌ ۖ وَمَا مِنْ إِلَٰهٍ إِلَّا اللَّهُ الْوَاحِدُ الْقَهَّارُ ﴿٦٥﴾

सांगून टाका की, मी तर फक्त सावध करणारा आहे.[५] आणि एक अल्लाह् प्रबळच्या, शिवाय आणखी कोणी उपासनेच्या लायक नाही. ६५

رَبُّ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا الْعَزِيزُ الْغَفَّارُ ﴿٦٦﴾

जो आकाश आणि पृथ्वीचा पालनकर्ता आहे, आणि जे काही त्यांच्या दर्म्यान आहे; तो सामर्थ्यवान आणि मोठा क्षमाकर्ता आहे. ६६

قُلْ هُوَ نَبَأٌ عَظِيمٌ ﴿٦٧﴾

आपण सांगून द्या की, ही फार मोठी बातमी आहे.[६] ६७

أَنتُمْ عَنْهُ مُعْرِضُونَ ﴿٦٨﴾

ज्यापासून तुम्ही बेपर्वा होत आहात ६८

مَا كَانَ لِيَ مِنْ عِلْمٍ بِالْمَلَإِ الْأَعْلَىٰ إِذْ يَخْتَصِمُونَ ﴿٦٩﴾

मला त्या उच्च पदस्थ देवदूतांच्या (गप्पागोष्टींचे) काहीच ज्ञान नव्हते जेव्हा की ते भांडत होते.[७] ६९

إِن يُوحَىٰ إِلَيَّ إِلَّا أَنَّمَا أَنَا نَذِيرٌ مُّبِينٌ ﴿٧٠﴾

माझ्याकडे फक्त हेच 'वह्य' केले जाते की, मी तर धडधडीत पणे सावध करणारा आहे.[८] ७०

إِذْ قَالَ رَبُّكَ لِلْمَلَائِكَةِ إِنِّي خَالِقٌ بَشَرًا مِّن طِينٍ ﴿٧١﴾

जेव्हा तुमच्या पालन कर्त्यांने देवदूतांना सांगितले[९] की मी मातीपासून मनुष्याला निर्माण[१०] करणार आहे. ७१

१) असरारने अभिप्रेत ईमानवाल्यांमधील गरीब लोक आहेत. जसे अम्मार, खब्बाब, सुहैब, बिलाल आणि सलमान वगैरे. रजी अल्लाहु अनहुम. त्यांना मक्केचे श्रीमंत लोक, आपल्या मनातील द्वेषामुळे घाणेरडे 'वाईट' म्हणत असत. आणि आता सुध्दा असत्यवादी लोक, सत्यावर चालणाऱ्यांना, सनातनी, दहशतवादी, धर्मवेडे, वगैरे पदव्या बहाल करतात. अशाच प्रकारे बिदअती लोक निस्सीम सुन्नत वर चालणाऱ्या लोकांना 'वाईट' ठरवतात.

२) म्हणजे जगांत ,जेथे आम्ही चुकीवर होतो?

३) किंवा ते पण आमच्या बरोबरच येथेच कोठे आहेत, आमची दृष्टी त्यांना बघू शकत नाही?

४) म्हणजे आपसात त्यांचा वादविवाद , आणि एक दुसऱ्याला टीकेचे लक्ष बनविणे , एक असे वास्तव आहे. जे घडूनच राहील.

५) म्हणजे जशी तुम्ही कल्पना करतात , मी तो नाही . किंबहुना तुम्हास अल्लाहची शिक्षा आणि त्यांच्या अप्रसन्नतेने, भिवविणारा आहे .

६) म्हणजे मी तुम्हास ज्या पारलौकिक शिक्षेने भिववित आहे, आणि एकेश्वरवादाचे आवाहन करीत आहे, ही मोठी बातमी आहे. इच्याकडून विन्मुख होऊ नका, तसेच तिच्याकडे दुर्लक्ष करू नका,किंबहुना इच्यावर लक्ष देण्याची आणि गांभिर्य्याने विचार करण्याची, आवश्यकता आहे.

७) मलई आला ने अभिप्रेत देवदूत आहेत. म्हणजे ते कोणत्या गोष्टीवर वादविवाद करीत आहेत? मी जाणत नाही. शक्य आहे या वादविवादाने अभिप्रेत ते संभाषण असावे , जे आदमच्या निर्मितीच्या वेळी झाले . जसा की पुढे यांचा उल्लेख येत आहे.

८) म्हणजे माझी जबाबदारी हीच आहे की, मी ते फर्ज आणि सुन्नत तुम्हास दाखवून द्याव्यात , ज्यांचा अंगिकार केल्याने तुम्ही अल्लाहच्या शिक्षेकडून वाचून जावे. आणि त्या निषीध्द आणि पापांचा खुलासा करून द्यांवा, ज्यांच्या पासून वांचल्याने तुम्ही अल्लाहच्या प्रसन्नतेचे , आणि असे न केल्यास त्याचा प्रकोप आणि नाराजीला पात्र ठराल, याच त्या गोष्टी आहेत, ज्याचे वह्य माझ्याकडे केले जाते.

९) ही गोष्ट याच्यापूर्वी, सू. बकर:, सू. अअराफ, सू. हिज्र, सू. बनी इस्राईल, आणि सू. कहफमध्यें वर्णन होऊन चुकली आहे. आता तिला येथे संक्षिप्त स्वरूपात सांगण्यात येत आहे.

१०) म्हणजे एक शरीर मानवजातीचा बनविणार आहे. मनुष्याला बशर, जमिनीपासून त्याला निर्माण करण्याच्या कारणाने म्हटले म्हंणजे जमिनीशीही त्याचे सर्व संलग्न होणे आहे. आणि तो सर्व काही याच जमिनीवर करतो.

فَاِذَا سَوَّيْتُهٗ وَنَفَخْتُ فِيْهِ مِنْ رُّوْحِيْ فَقَعُوْا لَهٗ سٰجِدِيْنَ ﴿٧٢﴾

**तर जेव्हा मी त्याला ठीक ठाक करून घेईन (१) आणि त्यात आपला आत्मा फुंकून (२) टाकीन, तेव्हा तुम्ही सर्व त्याच्यासमोर सजद्यांत पडून जा (३) ७२**

فَسَجَدَ الْمَلٰٓئِكَةُ كُلُّهُمْ اَجْمَعُوْنَ ﴿٧٣﴾

**म्हणून सर्व देवदूतांनी सजदा केला. (४) ७३**

اِلَّآ اِبْلِيْسَ ؕ اِسْتَكْبَرَ وَكَانَ مِنَ الْكٰفِرِيْنَ ﴿٧٤﴾

**परंतु इब्लीसने (केला नाही) त्याने अहंकार केला (५) आणि तो होताच काफिरांमधून (६) ७४**

قَالَ يٰٓاِبْلِيْسُ مَا مَنَعَكَ اَنْ تَسْجُدَ لِمَا خَلَقْتُ بِيَدَيَّ ؕ اَسْتَكْبَرْتَ اَمْ كُنْتَ مِنَ الْعَالِيْنَ ﴿٧٥﴾

**(अल्लाहतआलाने) फर्माविले, हे इब्लिसा! तुला याला सजदा करण्यापासून कोणत्या गोष्टीने अडविले, ज्याला मी आपल्या हातांनी निर्माण केले (७) की काय तू गर्वांत येऊन गेला आहेस? किंवा तू मोठ्या दर्जावाल्यामधून आहेस? ७५**

قَالَ اَنَا خَيْرٌ مِّنْهُ ؕ خَلَقْتَنِيْ مِنْ نَّارٍ وَّخَلَقْتَهٗ مِنْ طِيْنٍ ﴿٧٦﴾

**त्याने उत्तर दिले की मी याच्याहून उत्तम आहे. तू मला अग्नीपासून बनविले, आणि याला मातीपासून बनविले आहेस. (८) ७६**

قَالَ فَاخْرُجْ مِنْهَا فَاِنَّكَ رَجِيْمٌ ﴿٧٧﴾

**सांगण्यात आले की, तू येथून निघून जा! तू धुत्कारलेला झालास ७७**

وَّاِنَّ عَلَيْكَ لَعْنَتِيْٓ اِلٰى يَوْمِ الدِّيْنِ ﴿٧٨﴾

**आणि तुझ्यावर कयामतच्या दिवसापर्यंत माझा धिक्कार आणि फिटकार आहे. ७८**

१) म्हणजे त्याला मनुष्याच्या बनावटीत ढाळून घेईन. आणि त्याचे सर्व अवयव दुरुस्त आणि बरोबर करून घेईन.

२) म्हणजे तो आत्मा, ज्याचा मीच मालक आहे; माझ्याशिवाय याचा कोणी अधिकार बाळगत नाही. आणि ज्याच्या फुंकल्यानंतर, हा मातीचा पुतळा, जीवन, हालचाल, आणि तारूण्याने संपन्न होऊन जाईल. मनुष्याच्या प्रतिष्ठा आणि महानतेसाठी हीच गोष्ट पुरेशी आहे कीं, याच्यांत तो आत्मा फुंकला गेला आहे, ज्याला अल्लाहतआलाने आपला आत्मा ठरविले आहे.

३) हा सजदा तहिय्या किंवा सज्दा ताजीम आहे. उपासनेचा सजदा नाही. म्हणजे ताजीमी सज्दा पहिले योग्य होता म्हणूनच अल्लाहने, आदम करीता देवदूतांना याचा हुकूम दिला. आता इस्लाममध्ये ताजीमी सज्दा सुध्दां कोणाकरीता योग्य नाही. हदीसमध्ये येते, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''जर हा योग्य असता तर मी स्त्रीला हुकूम देतो कीं तिने आपल्या पतीला सज्दा करावा'' (मिशकात बहवाला तिर्मिझी.)

४) ही मानवाची दुसरी प्रतिष्ठा आहे, की, देवदुतांना त्याला सजदा करावयास सांगितले. म्हणजे देवदूतांसारख्या पवित्र सृष्टीने त्याला सन्मानार्थ सजदा केला 'कुल्लहुम' ने उघड होते कीं, एक देवदूत सुध्दा सज्दा करण्यात मागे राहिला नाही. याच्यानंतर 'अजमऊन' म्हणून हे स्पष्ट करून दिले कीं, सज्दा सुध्दा सर्वांनी एकाच वेळेला केला. वेगवेगळ्या समयी नाही.

५) जर इब्लीसला देवदूतांच्या वैशिष्ट्यांनी भारीत मानले जाईल. म्हणजे इब्लीस या सजद्याच्या हुकूमात दाखल होईल. म्हणजे तो या हुकूमात (देवदूताच्या) दाखल नव्हता परंतु आकाशात राहिल्यामुळे त्याला पण हुकूम देण्यात आला. परंतु अहंकारामुळे याला नकार दिला.

६) म्हणजे अल्लाहतआलाच्या हुकूमाचा विरोध आणि त्याच्या आज्ञापालनापासून अहंकार, यामुळे तो काफिर होऊन गेला. किंवा अल्लाहच्या ज्ञानांत तो काफिर होता.

७) हे पण मनुष्याच्या प्रतिष्ठा आणि महानतेसाठी सांगितले, नाही तर प्रत्येक वस्तुंचा निर्माता अल्लाहच आहे.

८) म्हणजे शैतानाने आपल्या चुकीच्या कल्पनेने असे समजले कीं, आगीचा दर्जा मातीच्या दर्जापेक्षा उत्तम आहे. त्यांच्यातून कोणाला, दुसऱ्यावर प्रतिष्ठा काही कारणास्तव प्राप्त होत असते. आणि हेच कारण आगीच्या तुलनेत, मातीच्या वाट्याला आले की, अल्लाहने हिच्यापासून आदमला आपल्या हाताने बनविले ,मग त्यांच्यात आपला आत्मा फुंकला . या अनुषंगाने मातीलाच ,आगीच्या तुलनेत प्रतिष्ठा आणि मोठेपण प्राप्त होते. याशिवाय आगीचे काम जाळून भस्म करून देणे आहे, जेव्हा की,माती यांच्या उलट निरनिराळ्या प्रकारच्या पैदावारीचे ठिकाण आहे.

قَالَ رَبِّ فَأَنظِرْنِيٓ إِلَىٰ يَوْمِ يُبْعَثُونَ ﴿٧٩﴾
**म्हणू लागला हे माझ्या पालनकर्त्या! लोकांच्या उठून उभे रहाण्याच्या दिवसापर्यंत मला सवलत दे. (७९)**

قَالَ فَإِنَّكَ مِنَ ٱلْمُنظَرِينَ ﴿٨٠﴾
**(अल्लाहतआलाने) सांगितले तू सवलत दिलेल्यामधून आहेस. (८०)**

إِلَىٰ يَوْمِ ٱلْوَقْتِ ٱلْمَعْلُومِ ﴿٨١﴾
**निश्चित वेळेच्या दिवसापर्यंत (८१)**

قَالَ فَبِعِزَّتِكَ لَأُغْوِيَنَّهُمْ أَجْمَعِينَ ﴿٨٢﴾
**म्हणू लागला मग तर तुझ्या प्रतापाची शपथ! मी या सर्वांना खचित्‌च बहकवून टाकीन. (८२)**

إِلَّا عِبَادَكَ مِنْهُمُ ٱلْمُخْلَصِينَ ﴿٨٣﴾
**शिवाय तुझ्या त्या सेवकांच्या, जे निवडक आणि आवडते असतील. (८३)**

قَالَ فَٱلْحَقُّ وَٱلْحَقَّ أَقُولُ ﴿٨٤﴾
**सांगितले, खरे तर हे आहे, आणि मी खरेच सांगत असतो. (८४)**

لَأَمْلَأَنَّ جَهَنَّمَ مِنكَ وَمِمَّن تَبِعَكَ مِنْهُمْ أَجْمَعِينَ ﴿٨٥﴾
**कीं, तुझ्याने आणि तुझ्या सर्व मानणाऱ्यांनी, मी (सुध्दां) नरकाग्नीला भरून टाकीन. (८५)**

قُلْ مَآ أَسْـَٔلُكُمْ عَلَيْهِ مِنْ أَجْرٍ وَمَآ أَنَا۠ مِنَ ٱلْمُتَكَلِّفِينَ ﴿٨٦﴾
**सांगून द्या की, मी तुमच्याकडून यावर काही मोबदला तर मागत नाही; [१] आणि मी तकल्लूफ करणाऱ्यांमधून नाही. [२] (८६)**

إِنْ هُوَ إِلَّا ذِكْرٌ لِّلْعَٰلَمِينَ ﴿٨٧﴾
**हे तर सकल जगाकरिता निव्वळ उपदेश (आणि बोध) [३] आहे. (८७)**

وَلَتَعْلَمُنَّ نَبَأَهُۥ بَعْدَ حِينٍۭ ﴿٨٨﴾
**खचित्‌च तुम्ही याच्या हकीकतीला, काही काळानंतर, (योग्य रित्या) जाणून घ्याल. [४] (८८)**

१) म्हणजे या प्रचार आणि प्रसाराने, माझा उद्देश्य फक्त अल्लाहच्या हुकुमाला मानणे आहे, ऐहिक फायदे मिळविणे नाही.

२) म्हणजे आपल्याकडून रचून, अलाहकडे अशी गोष्ट लावून द्यावी , जी त्याने सांगितली नसेल .किंवा मी तुम्हास अशा गोष्टीकडे बोलवावे ज्यांचा हुकूम अल्लाहने दिला नसावा . किंबहुना काही कमी जास्त केल्या शिवाय अल्लाहचे आदेश तुमच्या पर्यंत पोहचवित आहे . ह. अबदुल्लाह बिन मसऊद ﷺ म्हणत असत , ''ज्याला कोणत्या गोष्टीचे ज्ञान नसेल , त्याच्या बाबतीत त्याला सांगून द्यावयास पाहीजे , (अल्लाहू अअलम) हे सांगणे पण ज्ञानच आहे. या साठीकी,अल्लाहने आपल्या पैगंबरांना सांगितले , सांगून टाका ,वमा अना मिनल मुतकल्लिफीन. (इब्ने कसीर) याच्या शिवाय याच्याने जीवनाच्या सर्व साधारण मामल्यात सुध्दा, बनावटीने यापासून वाचण्याचा हूकूम माहीत होतो . जसे नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''आम्हास तकल्लूफ (बनावटी) पासून मना केले गेले आहे'' ( स.बुखरी भु.७२९३) ह. सलमान (रजी) म्हणतात, ''आम्हास रसूलुल्लाह्‌ सल्लल्लाहु अलैही व सल्लमनी, पाहुण्याकरिता तकल्लुफ करण्यास मना केले आहे.'' (स. जामिऊस सगीर, अल्बानी- १८७१) याच्याने ठाऊक झाले कीं, पोषाख, खाद्य, रहाण्याचे ठिकाण आणि दुसऱ्या मामल्यांमध्ये त्रास सहन करणे, जे आजकाल, जीवनमान उंचाविण्यासाठी, च्या नावाखाली, मकदूरवाल्या लोकांची पध्दत आणि रिवाजच होऊन चुकला आहे. जे इस्लामी शिकवणीच्या विरुद्ध आहे. इस्लाम, मध्ये साधेपणा आणि निर्मोही जीवन अंगिकारण्याला सांगण्यात आले आहे. आणि त्याला प्रोत्साहन देण्यात आले आहे.

३) म्हणजे हे कुरआन, किंवा वह्य, किंवा आवाहन, जे मी सादर करीत आहे. जगभरातील मनुष्ये आणि जिन्नात यांच्यासाठी बोध आहे. या अटीवर की कोणी यापासून बोध घेण्याचा प्रयत्न करेल.

४) म्हणजे कुरआनाने ज्या गोष्टींचे वर्णन केले आहे, ज्या वचन आणि धमक्यांचा उल्लेख केला आहे. त्यांची वास्तविकता आणि सत्यता फारच जलद तुमच्यासमोर येऊन जाईल. म्हणून याची सत्यता बद्रच्या दिवशी स्पष्ट झाली, मक्केच्या विजयाच्या दिवशी झाली. किंवा मग मृत्यूच्या वेळी सर्वांवर स्पष्ट होऊन जाते.

महावाक्ये ७५ | सूरतुज्जुमर ३९ (मक्की) | रुकूअ ८

آياتها ٧٥ (٣٩) سُوْرَةُ الزُّمَرِ مَكِّيَّةٌ (٥٩) رُكوعاتها ٨

# (३९) सू. जुमर

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

تَنْزِيْلُ الْكِتٰبِ مِنَ اللّٰهِ الْعَزِيْزِ الْحَكِيْمِ ①

**या पुस्तकाचे अवतीर्ण होणे, सामर्थ्यवान आणि बुध्दीमान अल्लाहतआलाकडून आहे.** (१)

إِنَّآ أَنْزَلْنَآ إِلَيْكَ الْكِتٰبَ بِالْحَقِّ فَاعْبُدِ اللّٰهَ مُخْلِصًا لَّهُ الدِّيْنَ ②

**खचित्च आम्ही या पुस्तकाला आपणाकडे सत्यासह[१] अवतीर्ण केले आहेत. तर आपण फक्त अल्लाहचीच उपासना करावी, त्याच्याच करता धर्माला शुध्द करून.[२]** (२)

أَلَا لِلّٰهِ الدِّيْنُ الْخَالِصُ ۗ وَالَّذِيْنَ اتَّخَذُوْا مِنْ دُوْنِهٖٓ أَوْلِيَآءَ ۘ مَا نَعْبُدُهُمْ إِلَّا لِيُقَرِّبُوْنَآ إِلَى اللّٰهِ زُلْفٰى ۗ إِنَّ اللّٰهَ يَحْكُمُ بَيْنَهُمْ فِيْ مَا هُمْ فِيْهِ يَخْتَلِفُوْنَ ۗ إِنَّ اللّٰهَ لَا يَهْدِيْ مَنْ هُوَ كٰذِبٌ كَفَّارٌ ③

**खबरदार! अल्लाहतआला करीताच निर्मळ उपासना करणे आहे.[३] आणि ज्या लोकांनी त्याच्या शिवाय मित्र बनवून ठेवले आहे; (आणि म्हणतात की) आम्ही त्यांची उपासना फक्त यासाठी करतो की हे (बुजुर्ग मोठे लोक) अल्लाहच्या जवळीकीच्या मर्तब्यापर्यंत आमची पोहोच करून देतील.[४] हे लोक ज्या बाबतीत मतभेद करीत आहेत, त्याचा (खरा) फैसला अल्लाह (स्वत:) करील,[५] लबाड आणि कृतघ्न लोकांना अल्लाहतआला (सरळ) मार्ग दाखवीत[६] नसतो.** (३)

१) म्हणजे यांच्यात एकेश्वरवाद आणि पैगंबरी, परतून जाण्याचे ठिकाण आणि आदेश व फर्जचा जो दावा केला गेला आहे, ते सर्व सत्य आहे. आणि त्यांनाच मान्य करण्यात आणि अंगिकारण्यात मनुष्याची मुक्ती आहे.

२) धर्माचा अर्थ येथे उपासना आणि आज्ञापालनाचा आहे. आणि इखलासचा अर्थ आहे, फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेच्या इरादाने, सुकर्म करावे. हे महावाक्य निय्यतच्या वाजिब होण्यावर आणि त्याच्या इखलासवर प्रमाण आहे. हदीसमध्ये सुध्दा, इखलासे नियतचे महत्त्व, हे सांगून स्पष्ट करून देण्यात आले आहे कीं, ''कर्मांची दारोमदार नियतवर आहे.'' (स.बुखारी) म्हणजे जे पण भलाईचे काम अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी केले जाईल (या अटीवर कीं ते सुन्नत प्रमाणे असावे) ते मान्य पावलेले; आणि ज्या कर्मामध्ये आणखी कोण्या भावनेचे मिश्रण असेल ते अमान्य होईल.

३) ही त्याच निखालस उपासनेची ताकीद आहे, ज्याचा हुकूम याच्या पूर्वीच्या महावाक्यात आहे की,उपासना आणि आज्ञापालन फक्त एका अल्लाहचाच हक्क आहे. न त्याच्या उपासनेत कोणाला शरीक करणे योग्य आहे, न आज्ञापालनालाच त्याच्याशिवाय अन्य कोणी हक्कदार आहे. तथापि पैगंबराच्या आज्ञापालनाला कारण की, स्वत: अल्लाहने आपलेच आज्ञापालन ठरविले आहे. म्हणून पैगंबराचे आज्ञापालन, अल्लाहचेच आज्ञापालन आहे. कोण्या दुसऱ्याचे नाही. तथापि उपासनेमध्ये ही गोष्ट पण नाही. म्हणून उपासना अल्लाहच्या शिवाय, कोण्या मोठ्यांत मोठ्या पैगंबराची पण योग्य नाही, मग का म्हणून, सामान्य व्यक्ती आणि मनुष्ये यांची ज्यांना लोकांनी आपल्याकडून ईश्वरीय अधिकार धारण करणारे ठरवून ठेवले आहे. ''मा अन्जलल्लाहु बिहा मिन् सुलतान'' अल्लाहकडून याच्यावर काही ही प्रमाण नाही

४) याच्याने स्पष्ट आहे की मक्केचे मुशरिक, अल्लाहतआलालाच, निर्माणकर्ता, अन्नसंपत्ती देणारा, आणि विश्वाचा प्रबंध करणारा मानत होते. मग ते दुसऱ्यांची उपासना का करीत होते? याचे उत्तर ते हे देत असत, जे कुरआनाने येथे नोंदविले आहे की, कदाचित् त्यांच्यामार्फत, आम्हास अल्लाहची जवळीक साधली जाईल. किंवा ते अल्लाहजवळ आमची शिफारस करून देतील. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आणि म्हणतात कीं, हे अल्लाहच्या जवळ आमचे शिफारसी आहेत.''(सू.यूनुस-१८)

५) कारण की जगात कोणी पण हे मानण्यांस तयार नाही कीं तो शिर्क करीत आहे, किंवा तो सत्यावर नाही. कयामतच्या दिवशी अल्लाहतआलाच फैसला करून टाकील. आणि त्याच्या प्रमाणे बक्षीस किंवा शिक्षा देईल.

६) हे खोटेच आहे कीं, या निरर्थक उपास्यांच्या मार्फत, यांची अल्लाहजवळ पोहोच होऊन जाईल, किंवा हे यांची शिफारस करतील. आणि अल्लाहला सोडून काहीही अधिकार नसलेल्या लोकांना उपास्य समजणे पण फारच मोठी कृतघ्नता आहे. अशा खोट्या आणि कृतघ्नांना, हिदायत कशी काय नशीबी येईल?

لَوْ اَرَادَ اللّٰهُ اَنْ يَّتَّخِذَ وَلَدًا لَّاصْطَفٰى مِمَّا يَخْلُقُ مَا يَشَآءُ ۙ سُبْحٰنَهٗ ؕ هُوَ اللّٰهُ الْوَاحِدُ الْقَهَّارُ ﴿۴﴾

जर अल्लाहतआलाचा इरादा संततीचाच असता, तर आपल्या सृष्टीमधून ज्याला इच्छिता, निवडून घेता (परंतु) तो तर पवित्र आहे. [१] तो तोच अल्लाहतआला आहे, एकटा आणि सामर्थ्यवान. ④

خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ بِالْحَقِّ ۚ يُكَوِّرُ الَّيْلَ عَلَى النَّهَارِ وَيُكَوِّرُ النَّهَارَ عَلَى الَّيْلِ وَسَخَّرَ الشَّمْسَ وَالْقَمَرَ ؕ كُلٌّ يَّجْرِيْ لِاَجَلٍ مُّسَمًّى ؕ اَلَا هُوَ الْعَزِيْزُ الْغَفَّارُ ﴿۵﴾

फार चांगल्या प्रयोजनाने त्याने आकाश आणि पृथ्वीला बनविले. तो रात्रीला दिवसावर, आणि दिवसाला रात्रीवर लपटून देतो. [२] आणि त्याने सूर्य व चंद्राला कामावर लावून ठेवले आहे. प्रत्येक निश्चित मुदतीपर्यंत चालत राहिला आहे. विश्वास ठेवा की, तोच सामर्थ्यवान आणि अपराधांचा क्षमाकर्ता आहे. ⑤

خَلَقَكُمْ مِّنْ نَّفْسٍ وَّاحِدَةٍ ثُمَّ جَعَلَ مِنْهَا زَوْجَهَا وَاَنْزَلَ لَكُمْ مِّنَ الْاَنْعَامِ ثَمٰنِيَةَ اَزْوَاجٍ ؕ يَخْلُقُكُمْ فِيْ بُطُوْنِ اُمَّهٰتِكُمْ خَلْقًا مِّنْۢ بَعْدِ خَلْقٍ فِيْ ظُلُمٰتٍ ثَلٰثٍ ؕ ذٰلِكُمُ اللّٰهُ رَبُّكُمْ لَهُ الْمُلْكُ ؕ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۚ فَاَنّٰى تُصْرَفُوْنَ ﴿۶﴾

त्याने तुम्हाला एकाच जीवापासून निर्माण केले आहे. [३] मग त्याच्या पासूनच त्याचे जोडपे निर्माण केले. [४] आणि तुमच्या करीता, चतुष्पादांतून (आठ नर आणि मादी) उतारले. [५] तो तुम्हांस तुमच्या आईंच्या पोटांत एका अवस्थेच्या नंतर दुसऱ्या अवस्थेत बनवित असतो, [६] तीन तीन अंध:कारात [७] हाच अल्लाहतआला तुमचा पालनकर्ता आहे; त्याच्याचकरिता, हुकूमत आहे. त्याच्या शिवाय कोणी उपास्य नाहीं, मग तुम्ही का बहकत आहात? [८] ⑥

اِنْ تَكْفُرُوْا فَاِنَّ اللّٰهَ غَنِيٌّ عَنْكُمْ ۫ وَلَا يَرْضٰى لِعِبَادِهِ الْكُفْرَ ۚ وَاِنْ تَشْكُرُوْا يَرْضَهُ لَكُمْ ؕ وَلَا تَزِرُ وَازِرَةٌ وِّزْرَ اُخْرٰى ؕ ثُمَّ اِلٰى رَبِّكُمْ مَّرْجِعُكُمْ فَيُنَبِّئُكُمْ بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ؕ اِنَّهٗ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ﴿۷﴾

जर तुम्ही कृतघ्नता दाखवाल, तर (लक्षात ठेवा की) अल्लाहतआला तुम्हा(सर्वां) कडून निरपेक्ष आहे; [९] आणि तो आपल्या सेवकांच्या कृतघ्नतेने खूष नाही. आणि जर तुम्ही आभार मानाल, तर तो याच्यामुळे तुमच्यावर खूष होईल [१०] आणि कोणी कोणाचे ओझे उचलत नाहीं. मग तुम्हा सर्वाचे पालटून येणे, तुमच्या पालन कर्त्याकडेच आहे. तुम्हास तो दाखवून देईल, जे तुम्ही करीत होता खचित्च तो मनातील गोष्टींशी वाकबगार आहे. ⑦

وَاِذَا مَسَّ الْاِنْسَانَ ضُرٌّ دَعَا رَبَّهٗ مُنِيْبًا اِلَيْهِ ثُمَّ اِذَا خَوَّلَهٗ نِعْمَةً مِّنْهُ نَسِيَ مَا كَانَ يَدْعُوْٓا اِلَيْهِ مِنْ قَبْلُ وَجَعَلَ لِلّٰهِ اَنْدَادًا لِّيُضِلَّ عَنْ سَبِيْلِهٖ ؕ قُلْ تَمَتَّعْ بِكُفْرِكَ قَلِيْلًا ۖۗ اِنَّكَ مِنْ اَصْحٰبِ النَّارِ ﴿۸﴾

आणि मनुष्याला जेव्हा कधी कोणी दु:ख पोहचते, तर तो खूप वळून आपल्या पालनकर्त्याला बोलावितो; मग जेव्हा अल्लाहतआला आपल्याजवळून, देणगी देऊन टाकतो, तर तो याच्यापूर्वी जी दुआ करीत होता, तिला (पार) विसरून जातो, [११] आणि अल्लाहतआलाचे सरकतदार बनवू लागतो, ज्यामुळे (दुसऱ्यांना पण) त्याच्या मार्गावरून बहकवावे. आपण सांगून टाका की, आपल्या कुफ्रचा फायदा काही दिवस आणखी उचलून घ्या. (शेवटी तर) तू नर्कवासीच होणार आहेस ⑧

اَمَّنْ هُوَ قَانِتٌ اٰنَآءَ الَّيْلِ سَاجِدًا وَّقَآئِمًا يَّحْذَرُ الْاٰخِرَةَ وَيَرْجُوْا رَحْمَةَ رَبِّهٖ ؕ قُلْ هَلْ يَسْتَوِي الَّذِيْنَ يَعْلَمُوْنَ وَالَّذِيْنَ لَا يَعْلَمُوْنَ ؕ اِنَّمَا يَتَذَكَّرُ اُولُوا الْاَلْبَابِ ﴿۹﴾ ع ١٥

बरें! जो मनुष्य रात्रीच्या वेळा, सजदे आणि (अल्लाहच्या समोर) उभे रहाण्याच्या अवस्थेत (उपासनेच्या) घालवित असेल परलोकाला भित असेल आणि आपल्या पालनकर्त्याच्या दयेचा उम्मीदवार असेल, [१२] सांगा बरे! जाणणारे आणि न जाणणारे कोठे बरोबर झाले आहेत? [१३] खचित्च उपदेश तेच ग्रहण करतात, जे बुध्दी संपन्न आहेत. [१४] ⑨

१) म्हणजे मग याची संतती मुलीच का असतील? ज्याप्रमाणे मुशरिक लोकांची धारणा होती. किंबहुना तो आपल्या सृष्टीमधून ज्याला पसंत करता, ती त्याची संतती असती न की ती, ज्यांना ते ठरवीत आहेत. परंतु तो तर या ढोषापासूनच पवित्र आहे. (इब्ने कसीर)

२) 'तकवीर' चा अर्थ आहे, एका वस्तुला, ढुसऱ्या वस्तुवर लपेटून ढेणे. रात्रीला दिवसावर लपटून ढेण्याचा अर्थ रात्रीला ढिवसावर ढापणे आहे. येथ पावेतो की त्याचा प्रकाश संपून जावा. आणि ढिवसाला रात्रीवर लपटून ढेण्याचा अर्थ, ढिवसाचे रात्रीवर ढांपणे आहे. येथ पावेतो की तिचा अंध:कार संपून जावा हा तोच अर्थ आहे जो ''युगशिल् लैल्न् नहार''(सू.आअराफ- ५४) चा आहे.

३) म्हणजे ह. आदम पासून, ज्यांना अल्लाहने आपल्या हाताने बनविले होते आणि आपल्याकडून त्यांच्यात आत्मा फुंकला होता.

४) म्हणजे ह. हव्वाला, ह. आदमच्या डाव्या पासळीपासून निर्माण केले आणि ही पण त्याच्या सामर्थ्याची कमाल आहे. कारण कीं, ह. हव्वाशिवाय कोण्याही स्त्रीची निर्मिती, कोण्या माणसाच्या पासळीपासून झाली नाहीं.अशाप्रकारे ही निर्मिती, नेहमीच्या पध्दती विरूध्द, आणि अल्लाह्च्या सामर्थ्याच्या निशाण्यांमधून आहे.
५) हे त्याच चार प्रकारच्या जनावरांचे वर्णन आहे; मेंढी, बकरी, उंट आणि गाय जे नर आणि मादी मिळून आठ होऊन जातात. ज्यांचा उल्लेख सू. अन्आम , आ. १४३,१४४ मध्ये येऊन चुकला. 'अन्जला' 'खलका' च्या अर्थांत आहे. किंवा एका रिवायतीनुसार, अल्लाह्ने प्रथम त्यांना स्वर्गांत निर्माण केले; मग त्यांना अवतीर्ण केले. तर हे उतारणे वास्तविक होईल. किंवा 'अन्जला' चे बोलणे शास्त्रीय आहे. यासाठी कीं ही जनावरे चाऱ्या शिवाय राहू शकत नाही. आणि चारा उगवेण्यासाठी पाणी आवश्यक आहे. जे आकाशातूनच पावसाच्या मार्फत उतरते. अशाप्रकारे जणू हे चतुष्पाद आकाशातून उतारलेले आहेत. (फत्हुल कदीर)
६) म्हणजे आईच्या पोटातून वेगवेगळ्या अवस्थातून पार पाडतो. पहिले वीर्य बिंदु, मग भ्रुण, मग मासांचा गोळा, मग हाडांचा सांगाडा, ज्याच्यावर मांसाचा पोषाख या सर्व अवस्थामधून पार पाडल्यानंतर, संपूर्ण मनुष्य तयार होत असतो.
७) एक आईच्या पोटाचा अंधकार, दुसरा गर्भाशयाचा अंधकार, तिसरा वारचा अंध:कार ते आवरण किंवा पर्दा, ज्यांच्यात मूल गुंडाळलेले असते.
८) किंवा, का तुम्ही सत्याहून असत्याकडे,आणि हिदायत कडून बहकण्याकडे, पलटून जात आहात?
९) याच्या खुलाशाकरीता पहा, सू.इब्राहिम आ. ८ चे भाष्य
१०) म्हणजे कुफ्र जरी मनुष्य, अल्लाह्च्या मर्जीनेच करतो. कारण की त्याच्या मर्जी वाचून कुठलेही काम होत नसते, न होऊंच शकते. तथापि कुफ्रला अल्लाह्तआला पसंत करीत नाही. त्याची प्रसन्नता प्राप्त करण्याचा मार्ग तर आभार मानण्याचाच मार्ग आहे, न की, कुफ्राचा. म्हणजे त्याची मर्जी वेगळी गोष्ट आहे, आणि त्याची प्रसन्नता वेगळी गोष्ट आहे. जसा की पूर्वीसुध्दा या मुद्द्याचा खुलासा काही ठिकाणी केला जाऊन चुकला आहे. (सू.बकरा २५३, सू.अन्आम-३५, सू.यासीन-४७, सू.जुखरुफ-२०)
११) किंवा त्या त्रासाला विसरून जातो, ज्याला दूर करण्यासाठी, तो दुसऱ्यांना सोडून, अल्लाहजवळ दुआ करीत होता. किंवा त्या पालनकर्त्याला विसरून जातो, ज्याला तो बोलवित होता आणि त्याच्यासमोर विनयशिलता दाखवित होता. आणि मग शिर्क मध्ये व्यस्त होऊन जातो.
१२) अर्थ हा आहे की, एक हा काफिर आणि मुशरिक आहे, ज्याची ही स्थिती आहे जी आता सांगितली गेली आणि दुसरा तो मनुष्य आहे, जो तंगदस्तीत आणि आनंदात रात्रीच्या घटका, अल्लाह्च्या समोर विनयशिलतेचे आणि आज्ञाधारक पणाचे प्रदर्शन करीत सजदे आणि उभे रहाण्यांत घालवून देतो. परलोकाचे भय पण त्याच्या मनांत आहे. आणि आपल्या पालनकर्त्यांच्या दयेचा पण उम्मीदवार आहे म्हणजे भय आणि आशा दोन्ही भावना त्यांच्यात आहेत, जे खरे ईमान आहे. काय ही दोघे बरोबर होऊ शकतात? नाही! खचित्च नाही. भय आणि आशा यांच्या बाबतीत हदीसमध्ये आहे ह. अन्स ﷺ वर्णन करतात. की, रसूलुल्लाह् सल्लाल्लाहु अलैहि व सल्लम एका माणसाजवळ गेले. जेव्हा की तो मृत्यूच्या सकरांत मध्ये होता. आपण (सल्ल) नी त्याला विचारले, ''तुला आपल्या स्वत:बद्दल कसे काय वाटते?'' तो म्हणाला, ''मी अल्लाह्शी आशा बाळगतो आणि आपल्या गुन्ह्यांमुळे भीत पण आहे.'' रसूलुल्लाह् ﷺ नी फर्माविले, ''या प्रसंगी ज्या सेवकाच्या मनात, या दोन्ही गोष्टी जमा होऊन जातील, तर अल्लाह त्याला ती वस्तू बहाल करतो, जिची तो आशा बाळगतो आणि त्यापासून त्याला वाचवून घेतो, ज्याची त्याला भीती वाटते.'' (तिर्मिझी, इब्ने माजा)
१३) म्हणजे ते जे जाणतात की अल्लाह्ने पुण्यप्रतिफल आणि शिक्षेचा जो वायदा केला आहे, तो सत्य आहे. आणि ते, जे या गोष्टीला जाणत नाहीं, हे दोघे समान नाहीत. एक जाणणारा आहे आणि एक अडाणी ज्याप्रमाणे ज्ञान आणि अज्ञानांत फरक आहे, त्याचप्रमाणे ज्ञाता आणि अडाणी समान नाहीत. असे पण असू शकते कीं, जाणणाऱ्या आणि न जाणणाऱ्याच्या या उदाहरणाने हे समजण्याचा उद्देश्य असावा की, ज्याप्रमाणे हे दोन्ही समान नाहीत. अल्लाहचा आज्ञाधारक आणि आज्ञाभंजक दोन्ही समान नाही. काहींनी याचा अर्थ हा सांगितला आहे की, 'आलिम' ने अभिप्रेत तो माणूस आहे, जो ज्ञानाप्रमाणे कर्म पण करतो. कारण कीं तोच ज्ञानापासून फायदा उचलणारा आहे. आणि जो कर्म करीत नाही, तो जणू असाच आहे की, त्याला ज्ञानच नाही. या अनुषंगाने हा कर्म करणारा आणि कर्म न करणाऱ्याचे उदाहरण आहे की, हे दोन्ही समान नाहीत.
१४) आणि हे ईमानवालेच आहेत न की, काफिर जरी ते आपल्या स्वत:ला बुध्दीसंपन्न, आणि अंतर दृष्टीवालेच समजत असतील. परंतु जेव्हा ते आपली बुध्दी आणि समज यांचा उपयोग करून, चिंतन आणि मननच करीत नाहीत, आणि बोध आणि उपदेश प्राप्त करीत नाहीत, तर ते जणू असेच आहेत की चतुष्पाद प्राण्यांसारखे, बुध्दी आणि समजपासून वंचित् आहेत.

قُلْ يٰعِبَادِ الَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّقُوْا رَبَّكُمْ ۭ لِلَّذِيْنَ
اَحْسَنُوْا فِيْ هٰذِهِ الدُّنْيَا حَسَنَةٌ ۭ وَاَرْضُ اللّٰهِ
وَاسِعَةٌ ۭ اِنَّمَا يُوَفَّى الصّٰبِرُوْنَ اَجْرَهُمْ بِغَيْرِ حِسَابٍ ﴿١٠﴾

**सांगून टाका कीं, हे माझ्या ईमानवाल्या सेवकांनो! आपल्या पालनकर्त्याला भीत रहा.[१] जे या जगात पुण्य करतात, त्यांच्या साठी चांगला बदला आहे.[२] अल्लाह्तआलाची जमीन फारच विस्तीर्ण आहे.[३] सहनशील लोकांनाच त्यांचा पुरेपूर अगणित मोबदला दिला जातो.[४] (१०)**

قُلْ اِنِّيْٓ اُمِرْتُ اَنْ اَعْبُدَ اللّٰهَ مُخْلِصًا لَّهُ
الدِّيْنَ ﴿١١﴾

**आपण सांगून टाका की, मला हुकूम देण्यात आला आहे की, अल्लाह्तआलाची अशा प्रकारे उपासना करा की, त्यांच्याच करता उपासनेला निर्मळ करून द्या. (११)**

وَاُمِرْتُ لِاَنْ اَكُوْنَ اَوَّلَ الْمُسْلِمِيْنَ ﴿١٢﴾

**आणि मला हुकूम देण्यात आला आहे की, मी सर्वांत प्रथम आज्ञाधारक बनून जावे[५] (१२)**

قُلْ اِنِّيْٓ اَخَافُ اِنْ عَصَيْتُ رَبِّيْ عَذَابَ يَوْمٍ
عَظِيْمٍ ﴿١٣﴾

**सांगून द्या की मला तर आपल्या पालनकर्त्याचा आज्ञाभंग करताना, मोठ्या दिवसाच्या शिक्षेची भीती वाटते. (१३)**

قُلِ اللّٰهَ اَعْبُدُ مُخْلِصًا لَّهُ دِيْنِيْ ﴿١٤﴾

**सांगून द्या की, मी तर निव्वळ फक्त आपल्या पालनकर्त्याचीच उपासना करतो. (१४)**

فَاعْبُدُوْا مَا شِئْتُمْ مِّنْ دُوْنِهِ ۭ قُلْ اِنَّ الْخٰسِرِيْنَ
الَّذِيْنَ خَسِرُوْٓا اَنْفُسَهُمْ وَاَهْلِيْهِمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ ۭ
اَلَا ذٰلِكَ هُوَ الْخُسْرَانُ الْمُبِيْنُ ﴿١٥﴾

**तुम्ही याच्या शिवाय ज्याची इच्छाल, त्याची उपासना करीत रहा; सांगून द्या की, वस्तुत: तोटा भोगणारे ते आहेत, जे आपल्या स्वत:ला, आणि आपल्या पोरा बाळांना कयामतच्या दिवशी नुकसानात टाकून देतील. लक्षात ठेवा हाच तर धडधडीत तोटा आहे. (१५)**

لَهُمْ مِّنْ فَوْقِهِمْ ظُلَلٌ مِّنَ النَّارِ وَمِنْ تَحْتِهِمْ ظُلَلٌ ۭ
ذٰلِكَ يُخَوِّفُ اللّٰهُ بِهِ عِبَادَهُ ۭ يٰعِبَادِ فَاتَّقُوْنِ ﴿١٦﴾

**त्यांना खालून आणि वरून अग्नीच्या (ज्वाला) छप्परा सारख्या झांकत असतील[६] हीच ती (शिक्षा) आहे जिच्यापासून अल्लाह्तआला आपल्या सेवकांना भिववित आहे.[७] हे माझ्या सेवकांनो! तर मला भित रहा. (१६)**

१) त्याचे आज्ञापालन करून, पापांपासून वाचून, आणि उपासना आणि आज्ञापालनाला, निव्वळ त्यांच्याचसाठी करुन.

२) हे ईशभयाचे फायदे आहेत. चांगल्या बदल्याने अभिप्रेत स्वर्ग आणि त्याच्या कायमच्या देणग्या आहेत. काही भाषांतर करतात, ''जे नेकी करतात, त्यांच्या करिता या जगांत चांगला बदला आहे.'' म्हणजे अल्लाह त्यांना जगांत आरोग्य आणि तंदुरस्ती, यश आणि धनसंपदा, वगैरे बहाल करतो. परंतु पहिला भावार्थच जास्त बरोबर आहे.

३) हा इशारा आहे या गोष्टीकडे की जर आपल्या मातृभूमीत ईमान आणि ईशभयावर कार्यरत होणे कठीण असेल, तर तेथे रहाणे चांगले नाही किंबहुना तेथून स्वदेश त्याग करून अशा इलाख्यात चालले जावयास पाहिजे, जेथे मनुष्य अल्लाह्च्या आदेशाप्रमाणे जीवन व्यतीत करू शकेल आणि जेथे ईमान आणि ईशभयांच्या मार्गांत अडथळा नसेल.

४) अशा प्रकारे ईमान आणि ईशभयाच्या मार्गात न टाळता येणाऱ्या अडचणी आणि वासना व मनाला आवडणाऱ्या गोष्टींचा त्याग पण आवश्यक आहे, ज्यासाठी सहनशिलतेची गरज आहे म्हणून सहनशील लोकांचे महात्म्य पण सांगून देण्यात आले की त्यांना त्यांच्या सहनशिलतेच्या बदल्यात, अशा प्रकारे पुरेपुर प्रतिफल देण्यात येईल की त्याला हिशेबाच्या मापाने मोजणे, शक्यच होणार नाही म्हणजे त्यांचे प्रतिफल मोजण्याच्या पलीकडे असेल कारण ज्या गोष्टीचा हिशेब शक्य असेल, त्याची तर एक मर्यादा असते. आणि ज्याला काही मर्यादा आणि शेवट नसेल, ती गोष्ट तीच असते जिची गणती करणे शक्य नसते. सहनशिलतेचे हे महान श्रेष्ठत्व आहे, जे प्रत्येक मुसलमानाला प्राप्त करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणून हाय वाय करणे आणि उतावळेपणा करून, आलेले संकट टळू शकत नाही. ज्या भलाई आणि फायद्याला मुकावे लागले आहे, तो प्राप्त होऊन जात नाही. आणि जी नावडती परिस्थिती, पुढे येऊन ठाकली आहे, ती दूर होणे शक्य नाही. जर अशी गोष्ट आहे तर, माणसाने सहनशिल बनून ते महान प्रतिफल का मिळवू नये, जे सहनशील लोकांकरता अल्लाह्तआलाने ठेवले आहे.

५) पहिला या अर्थांत की, वाडवडिलांच्या धर्माचा विरोध करून एकेश्वरवादाचे आवाहन सर्वांत प्रथम आपणच सादर केले.

६) 'जुलल' 'जुल्लतून' चे अनेकवचन आहे. म्हणजे छाया येथे 'अत्बाकून नार' अभिप्रेत आहे. म्हणजे त्यांच्या वर खाली आगीचे तबक असतील, जे यांच्यावर भडकत असतील. (फत्हुल कदीर)

७) म्हणजे हाच चर्चित, मोठा तोटा आणि तबकाची शिक्षा आहे, ज्यापासून अल्लाह्तआला आपल्या सेवकांना भिववीत आहे कारण की त्यांनी अल्लाह्च्या आज्ञापालनाचा मार्ग पत्करून या वाईट परिणामांपासून वाचून जावे.

وَالَّذِينَ اجْتَنَبُوا الطَّاغُوتَ أَن يَعْبُدُوهَا وَأَنَابُوا إِلَى اللَّهِ لَهُمُ الْبُشْرَىٰ ۚ فَبَشِّرْ عِبَادِ ﴿١٧﴾

आणि जे लोक तागूत (अल्लाहच्या शिवाय दुसऱ्यां उपास्य) पासून वाचले आणि (संपूर्णपणे) अल्लाह्कडेच वळले, ते शुभवर्तमानाला पात्र आहेत. तर अशा माझ्या सेवकांस शुभवर्तमान ऐकवून द्या. (१७)

الَّذِينَ يَسْتَمِعُونَ الْقَوْلَ فَيَتَّبِعُونَ أَحْسَنَهُ ۚ أُولَٰئِكَ الَّذِينَ هَدَاهُمُ اللَّهُ ۖ وَأُولَٰئِكَ هُمْ أُولُو الْأَلْبَابِ ﴿١٨﴾

जे गोष्टीला कान लाऊन ऐकतात मग जी उत्तम गोष्ट असेल [१] त्यावर अंमल बजावणी करतात. हेच आहे ज्यांना अल्लाह्तआलाने हिदायत केली आहे, आणि हेच बुध्दीसंपन्न पण आहेत. [२] (१८)

أَفَمَنْ حَقَّ عَلَيْهِ كَلِمَةُ الْعَذَابِ أَفَأَنتَ تُنقِذُ مَن فِي النَّارِ ﴿١٩﴾

बरे! ज्या मनुष्यावर शिक्षेची गोष्ट सिध्द होऊन चुकली आहे, [३] तर काय आपण त्याला जो नरकाग्नीत आहे, सोडवू शकतात? [४] (१९)

لَٰكِنِ الَّذِينَ اتَّقَوْا رَبَّهُمْ لَهُمْ غُرَفٌ مِّن فَوْقِهَا غُرَفٌ مَّبْنِيَّةٌ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۖ وَعْدَ اللَّهِ ۖ لَا يُخْلِفُ اللَّهُ الْمِيعَادَ ﴿٢٠﴾

हां! ते लोक जे आपल्या पालनकर्त्यास भीत राहिले त्यांच्याकरिता उंच स्थाने आहेत, ज्यांच्यावर सुध्दा अगदी तयार उच्च स्तरीय आहेत. [५] (आणि) त्यांच्या खालून झरे वाहत आहेत पालनकर्त्याचे अभिवचन आहे, [६] आणि तो वचनाच्या विरूध्द करीत नसतो. (२०)

أَلَمْ تَرَ أَنَّ اللَّهَ أَنزَلَ مِنَ السَّمَاءِ مَاءً فَسَلَكَهُ يَنَابِيعَ فِي الْأَرْضِ ثُمَّ يُخْرِجُ بِهِ زَرْعًا مُّخْتَلِفًا أَلْوَانُهُ ثُمَّ يَهِيجُ فَتَرَاهُ مُصْفَرًّا ثُمَّ يَجْعَلُهُ حُطَامًا ۚ إِنَّ فِي ذَٰلِكَ لَذِكْرَىٰ لِأُولِي الْأَلْبَابِ ﴿٢١﴾

काय आपण पाहिले नाही कीं, अल्लाह्तआला आकाशांतून पाणी वर्षवितो. आणि त्याला जमिनीच्या रंध्रा मध्ये पोहचवितो; [७] मग याच्यापासूनच वेगवेगळया प्रकारची शेते उगवितो; [८] मग ती वाळून जातात. आपण त्यांना पिवळे गर्द पडून गेलेले पाहतां; मग त्यांना चुरा चुरा करून टाकतो. [९] यांत बुध्दीवानाकरिता फार मोठा धडा आहे. [१०] (२१)

أَفَمَن شَرَحَ اللَّهُ صَدْرَهُ لِلْإِسْلَامِ فَهُوَ عَلَىٰ نُورٍ مِّن رَّبِّهِ ۚ فَوَيْلٌ لِّلْقَاسِيَةِ قُلُوبُهُم مِّن ذِكْرِ اللَّهِ ۚ أُولَٰئِكَ فِي ضَلَالٍ مُّبِينٍ ﴿٢٢﴾

काय तो मनुष्य ज्याचा सीना (हृदय) अल्लाह्तआलाने इस्लामसाठी उघडून दिला आहे, तर तो आपल्या पालनकर्त्याकडून एका प्रकाशावर आहे. [११] आणि बरबादी आहे, त्यांच्यावर ज्यांची अंत:करणे अल्लाह्च्या स्मरणाकडून परिणाम घेत नाही. किंबहुना कठोर होऊन गेली आहेत. हे लोक धडधडीत चुकीत आहेत. (२२)

اللَّهُ نَزَّلَ أَحْسَنَ الْحَدِيثِ كِتَابًا مُّتَشَابِهًا مَّثَانِيَ تَقْشَعِرُّ مِنْهُ جُلُودُ الَّذِينَ يَخْشَوْنَ رَبَّهُمْ ثُمَّ تَلِينُ جُلُودُهُمْ وَقُلُوبُهُمْ إِلَىٰ ذِكْرِ اللَّهِ ۚ ذَٰلِكَ هُدَى اللَّهِ يَهْدِي بِهِ مَن يَشَاءُ ۚ وَمَن يُضْلِلِ اللَّهُ فَمَا لَهُ مِنْ هَادٍ ﴿٢٣﴾

अल्लाह्तआलाने उत्कृष्ट वाणी अवतरीत केली आहे जे असे पुस्तक आहे की आपसात मिळती जुळती आणि पुन्हा पुन्हा सांगितली गेलेल्या महावाक्यांचे [१२] आहे ज्यामुळे त्या लोकांची शरीरे थरथर कापू लागतात, जे आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात. [१३] शेवटी त्यांची शरीरे आणि अंत:करणे, अल्लाह्तआलाच्या स्मरणाकडे झुकून जातात. [१४] ही आहे अल्लाह्तआलाची हिदायत! ज्याला इच्छितो, समजाऊन देतो. आणि ज्याला अल्लाह्तआलाच मार्ग विसरवून टाकेल, त्याचा मार्गदर्शक कोणी नाही. (२३)

१) 'अहसन' ने अभिप्रेत, मजबुत आणि पक्की गोष्टी, किंवा हुकूम केल्या गेलेल्यामधून सर्वांत चांगली गोष्ट, किंवा अजीमत (उच्च दर्जाचे ईमान व अंमल) आणि रूखसत (म्हणजे कमी दर्जाचे ईमान वर अंमल करणे) मधून अजीमत किंवा शिक्षेच्या मुकाबल्यांत, क्षमा करणे आणि विसरण्याचा अंगिकार करतात.

२) कारण की त्यांनी आपल्या बुध्दीने फायदा उचलला आहे जेव्हा कीं दुसऱ्यांनी आपल्या बुध्दीने फायदा उचलला नाही.

३) म्हणजे अल्लाह्चा हुकूम आणि दैवाच्या अनुषंगाने त्याचे शिक्षेला पात्र होणे सिध्द होऊन चुकले आहे, अशाप्रकारे कीं कुफ्र आणि जुलूम, अपराध व गुन्ह्यात, तो आपल्या शेवटाला पोहचून गेला, जेथून त्याचे परत फिरणे शक्य राहिले नाही. जसे अबुजहल, आणि आस बिन वायल, वगैरे आणि गुन्हयांनी त्याला पूर्णपणे घेरून घेतले, आणि तो नर्कवासी होऊन गेला.

४) नबी ﷺ ला कारण कीं, या गोष्टीची तीव्र इच्छा होती की आपल्या समाजाच्या सर्व लोकांनी ईमान घेऊन यावे. याच्यात अल्लाह्तआलाने, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे सांत्वन केले, आणि आपणांस सांगितले की, आपली इच्छा आपल्या जागी बिल्कुल बरोबर आणि योग्य आहे, परंतु ज्यावर याचे दैव बलवत्तर राहिले आणि अल्लाह्चे म्हणणे त्याच्या बाबतीत सिध्द होऊन चुकले, त्याला आपण नरकाग्नीच्या आगीपासून वाचविण्यास समर्थ नाहीं.

५) याचा अर्थ आहे की स्वर्गात दर्जे असतील एकाच्यावर एक. ज्याप्रमाणे येथे अनेक मजली इमारती आहेत. स्वर्गात

सुध्दा दर्जाच्या हिशेबाने एक दुसऱ्यावर वरच्या खोल्या असतील ज्यांच्या मधून स्वर्गवाल्यांच्या इच्छेप्रमाणे दूध, मध, पाणी आणि मद्याचे पाट वाहत असतील.

६) जो त्याने आपल्या ईमानवाल्या सेवकांशी केला आहे. आणि जो खचित्‌च पूर्ण होईल की, अल्लाह्‌कडून वचनभंग शक्य नाही.

७) 'यनाबीअ' 'यनबुअ' चे अनेक वचन आहे स्तोत्र झरे. म्हणजे पावसाच्या मार्फत पाणी आकाशातून उतरते मग ते जमिनीत शोषले जाते. आणि मग झऱ्यांच्या स्वरूपात निघते, किंवा तलाव आणि पाटांमध्ये जमा होते.

८) म्हणजे या पाण्याने जे एकच असते, नाना प्रकारच्या निरनिराळ्या वस्तू निर्माण करतो, ज्यांचा रंग, स्वाद, सुवास एक दुसऱ्यापासून वेगळा असतो.

९) म्हणजे हिरव्यागार आणि टवटवीतपणा नंतर, त्या शेत्या वाळून जातात. आणि पिवळया पडून जातात. आणि मग चुरा चुरा होऊन जातात. ज्या प्रमाणे लाकडाच्या फांद्या वाळून तुटून फुटून जातात.

१०) म्हणजे बुध्दीवंत याने समजून जातात कीं, जगाचे उदाहरण पण याच प्रमाणे आहे. ते पण लवकरंच ऱ्हास पावून नष्ट होणार आहे. त्याचे सौंदर्य आणि टवटवी, त्याची सुपिकता आणि भूषण, आणि त्याची गोडी आणि आराम चैन, तात्पुरत्या आहेत. ज्यांच्याशी मनुष्याने रंगून जावयांस नको किंबहुना त्या मृत्यूच्या तयारीत व्यस्त रहावयास पाहिजे, ज्याच्या नंतरचे जीवन कायम स्वरूपी आहे. ज्याला ऱ्हास नाही. काही म्हणतात की ही कुरआन आणि ईमानवाल्यांच्या अंत:करणाचे उदाहरण आहे. आणि अर्थ आहे कीं, अल्लाह्‌ने आकाशांतून कुरआन अवतरीत केले ज्याला तो ईमानवाल्यांच्या मनात दाखल करतो. मग याच्यामार्फत धर्म बाहेर पडतो. जो एक दुसऱ्यापेक्षां उत्तम असतो. तर ईमानवाला तर ईमान आणि विश्वासात अग्रेसर होऊन जातो. आणि ज्याच्या मनांत रोग असतो, तो अशाप्रकारे कोरडा होऊन जातो ज्याप्रमाणे शेती कोरडी होऊन जाते. (फत्हुल कदीर)

११) म्हणजे ज्याला सत्य कबूल करण्याची आणि भलाईचा मार्ग अंगीकारण्याची सुबुध्दी, अल्लाहतआलाकडून मिळून जाईल, त्याचे अंत:करण उघडून जाण्यामुळे आपल्या पालनकर्त्याच्या प्रकाशावर असेल, काय तो त्याच्या सारखा होऊ शकतो. ज्याचे अंत:करण इस्लामकरता कठोर आणि संकोच वृत्ती असेल, आणि तो बहकण्याच्या अंध:कारांत भटकत असेल.

१२) अहसनल हदीसने अभिप्रेत कुरआन मजीद आहे. मिळत्या जुळत्याचा अर्थ त्याचे सर्व भाग, सुंदर वाणी, शानदार वर्णन शैली, अर्थपूर्ण, वगैरे वैशिष्ट्यांमध्ये, एक दुसऱ्याशी मिळतात. किंवा हे पण पूर्वीच्या आकाशी ग्रंथांशी मिळतात; म्हणजे त्यांच्यासारखेच आहे. 'मसानी' ज्यांत गोष्टी व घटना, आणि उपदेश व आदेश यांना वारंवार पुन्हा पुन्हा सांगण्यात आले आहे.

१३) कारण कीं ते या धमकावण्यांना, आणि भिवविण्याला व तंबीला, समजतात, जे आज्ञाभंजकासाठी यांच्यात आहे.

१४) म्हणजे जेव्हा अल्लाह्‌ची रहमत आणि त्याच्या कृपेची आशा, त्यांच्या मनात निर्माण होते, तेव्हा त्यांच्यात, व्याकुळता आणि नम्रता, निर्माण होऊन जाते. आणि ते अल्लाह्‌च्या स्मरणांत व्यस्त होऊन जातात. ह. कतादा ﷺ म्हणतात की, यांच्यात अल्लाह्‌च्या वली (मित्रांचे) वैशिष्टय सांगण्यात आले आहे की, अल्लाह्‌च्या भयाने त्यांची अंत:करणे थरथर कापू लागतात. त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागतात. आणि त्यांची मने अल्लाह्‌च्या स्मरणाने संतोष पावतात. असे होत नाही कीं ते धुंद, आणि शुध्द हरवून बसतात. आणि अक्कल आणि समज बाकी रहात नाही. कारण कीं हे बिदअती लोकांचे वैशिष्टय आहे. आणि याच्यांत शैतानाचा हस्तक्षेप असतो. (इब्ने कसीर) जसे आजपण बिदअतींच्या कव्वालीमध्यें, अशा प्रकारच्या शैतानी हालचाली सार्वत्रिक आहे. ज्या ते ''वजद व हाल किंवा सुक्र व मस्ती'' ने संबोधतात. ईमाम इब्ने कसीर म्हणतात, ईमानवाल्यांचा मामला या बाबतीत, काफिरांच्या तुलनेत वेगळा आहे. एक हा की ईमानवाल्यांचे ऐकणे, कुरआन करीमचे पठण आहे. जेव्हा की काफिराचे राग ऐकणे निर्लज्ज स्त्रियांच्या आवाजात गाणे, बजावणे, ऐकणे आहे. (जसे बिदअत वाल्यांचे रंगून जाणे आणि शिर्कवाल्या अतिशयोक्ती वर आधारित कव्वाल्या आणि नआत आहेत) दुसरे हे कीं, ईमानवाले कुरआन ऐकून आदर आणि भयाने, चांगल्या आपेक्षेने आणि प्रेमाने, आणि ज्ञान व समज, यामुळे रडू लागतात. आणि सजद्यात पडून जातात. जेव्हा की काफिर गोंगाट करतात आणि खेळण्यात व्यस्त रहातात. तिसरे, ईमानवाले कुरआनाच्या ऐकण्याच्या वेळी आदर बाळगतात आणि नम्रता धारण करतात. जशी सहाबा कराम (रजी.)ची शुभ सवय होती. ज्यमुळे त्यांच्या अंगावर काटे उभे रहात आणि त्यांची मने अल्लाह्‌कडे झुकून जात. (इब्ने कसीर)

أَفَمَن يَتَّقِي بِوَجْهِهِۦ سُوٓءَ ٱلْعَذَابِ يَوْمَ ٱلْقِيَٰمَةِ ۚ وَقِيلَ لِلظَّٰلِمِينَ ذُوقُوا۟ مَا كُنتُمْ تَكْسِبُونَ ﴿٢٤﴾

बरे जो मनुष्य कयामतच्या दिवसाच्या वाईट शिक्षांची ढाल, आपल्या तोंडाला बनवील; अशा जालीमांना सांगण्यात येईल, आपल्या केल्याच्या दुष्परिणामाची गोडी चाखा. [१] (२४)

كَذَّبَ ٱلَّذِينَ مِن قَبْلِهِمْ فَأَتَىٰهُمُ ٱلْعَذَابُ مِنْ حَيْثُ لَا يَشْعُرُونَ ﴿٢٥﴾

यांच्या पूर्वीच्या लोकांनी पण खोटे ठरविले; मग त्यांच्यावर त्यांच्या बेखबरीच्या स्थितीतच शिक्षा येऊन पडल्यात. [२] (२५)

فَأَذَاقَهُمُ ٱللَّهُ ٱلْخِزْىَ فِى ٱلْحَيَوٰةِ ٱلدُّنْيَا ۖ وَلَعَذَابُ ٱلْـَٔاخِرَةِ أَكْبَرُ ۚ لَوْ كَانُوا۟ يَعْلَمُونَ ﴿٢٦﴾

आणि अल्लाहतआलने त्यांना ऐहिक जीवनांत फजितीची गोडी चाखविली. [३] आणि आता परलोकाची तर फार भारी शिक्षा आहे. जरा हे लोक जाणते तर, (२६)

وَلَقَدْ ضَرَبْنَا لِلنَّاسِ فِى هَٰذَا ٱلْقُرْءَانِ مِن كُلِّ مَثَلٍ لَّعَلَّهُمْ يَتَذَكَّرُونَ ﴿٢٧﴾

खचित्च आम्ही या कुरआनामध्ये, लोकांकरिता प्रत्येक प्रकारचे दृष्टांत वर्णन करून टाकले आहेत. कीं, कदाचित् त्यांनी बोध घ्यावा. [४] (२७)

قُرْءَانًا عَرَبِيًّا غَيْرَ ذِى عِوَجٍ لَّعَلَّهُمْ يَتَّقُونَ ﴿٢٨﴾

कुरआन आहे अरबीमध्ये ज्यात काही वाकडेपणा नाही. जेणे करून ते अल्लाहला भिऊन वागू लागतील. [५] (२८)

ضَرَبَ ٱللَّهُ مَثَلًا رَّجُلًا فِيهِ شُرَكَآءُ مُتَشَٰكِسُونَ وَرَجُلًا سَلَمًا لِّرَجُلٍ هَلْ يَسْتَوِيَانِ مَثَلًا ۚ ٱلْحَمْدُ لِلَّهِ ۚ بَلْ أَكْثَرُهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٢٩﴾

(ऐका!) अल्लाहतआला दृष्टांत देत आहे, एक तो मनुष्य (दास) आहे, ज्याच्यात पुष्कळसे प्रतिस्पर्धी पातीदार आहेत. आणि दुसरा तो मनुष्य (दास) आहे. जो फक्त एकाचाच (दास) आहे. काय हे दोघे वैशिष्ट्यांत एक सारखे होऊ शकतात? [६] सर्व स्तुती अल्लाहतआला [७] करताच आहे. गोष्ट ही आहे कीं, यांच्यातून बहुतेक लोक जाणत नाही. [८] (२९)

إِنَّكَ مَيِّتٌ وَإِنَّهُم مَّيِّتُونَ ﴿٣٠﴾

खचित्च तुम्हा स्वत:स पण मृत्यूची गोडी चाखायची आहे; आणि हे सर्व पण मृत्यू पावणार आहेत. (३०)

ثُمَّ إِنَّكُمْ يَوْمَ ٱلْقِيَٰمَةِ عِندَ رَبِّكُمْ تَخْتَصِمُونَ ﴿٣١﴾

मग तुम्ही सर्वच्या सर्व कयामतच्या दिवशी आपल्या पालनकर्त्या समोर झगडाल. [९] (३१)

१)म्हणजे काय हा मनुष्य त्या माणसासारखा होऊ शकतो, जो कयामतच्या दिवशी बिलकुल निर्भय आणि सुखात असेल?

२) आणि त्यांना या शिक्षांपासून कोणी वाचवू शकले नाही.

३) ही मक्केच्या काफिरांना धमकी आहे की, मागे होऊन गेलेल्या लोकांनी पैगंबरांना खोटे ठरविले, तर त्यांची ही अवस्था झाली. आणि तुम्ही पैगंबरांमध्ये प्रतिष्ठित, आणि मानवांमध्ये श्रेष्ठत्वाला म्हणजे मोहम्मद (सल्ल.) ला खोटे ठरवत आहात, तुम्हाला पण या खोटे ठरवण्याच्या परिणामाला भ्यावयास पाहिजे.

४)म्हणजे लोकांना समजाविण्याकरिता, प्रत्येक प्रकारचे दृष्टांत सांगून दिले आहेत कारण की, लोकांच्या लक्षात गोष्टी येऊन जाव्यात. आणि त्यांनी बोध घ्यावा.

५) म्हणजे कुरआन स्पष्ट अरबी भाषेत आहे; ज्याच्यांत काही वक्रता. विरोधाभास आणि शंकाकुशंका नाहीत कारण की, लोकांनी त्यांत वर्णन केलेल्या धमक्यांनी भ्यावे. आणि त्यात वर्णन केलेल्या अभिवचनाला पात्र होण्यासाठी कर्म करावे.

६) यांच्यात मुशरिक (अल्लाहचा शरिक ठरविणारे) आणि मुखलिस (फक्त एका अल्लाहची उपासना करणारे) चा दृष्टांत वर्णन करण्यात आला आहे. म्हणजे एक दास आहे जो कित्येक माणसांत सामायिक आहे. म्हणून ते आपसात झगडत राहतात. आणि आणखी एक गुलाम आहे. ज्याचा मालक फक्त एकच माणूस आहे. त्याच्या मालकीत, त्याच्या

बरोबर आणखी कोणी पातीदार नाही. काय हे दोन्ही गुलाम बरोबर होऊ शकतात? नाही! खचितच नाही!! अशाच प्रकारे तो मुशरिक, जो अल्लाह बरोबर दुसऱ्या उपास्यांची पण उपासना करतो; आणि तो मुखलिस ईमानवाला, जो फक्त एका अल्लाहची उपासना करतो; त्याच्या बरोबर कोणाला पातीदार ठरवत नाही; समान होऊ शकत नाहीत.

७) या गोष्टीवर की त्याने तर्क कायम करुन दिला.

८) म्हणूनच अल्लाहबरोबर शिर्क करतात.

९) म्हणजे अहो पैगंबरा! आपण सुध्दा आणि आपले विरोधक सुध्दा, सर्व मृत्यू पाऊन, या जगापासून आमच्याजवळ, परलोकात येतील. या जगांत तर एकेश्वरवाद आणि शिर्क चा निर्णय, तुमच्या दर्म्यान होऊ शकला नाही, आणि तुम्ही या बाबतीत झगडतच राहिले. परंतु येथे मी त्याचा फैसला करीन. आणि फक्त एका अल्लाहची उपासना करणारे एकेश्वरवादींना स्वर्गांत आणि शिर्क करणारे व नाकारणारे, आणि खोटे ठरवणारे, यांना नरकाग्नीत दाखल करीन. या महावाक्याने सुध्दा नबी ﷺ ला मृत्यू येण्याचा आधार मिळतो. ज्याप्रमाणे सू. आले इमरानचे महावाक्य क्र. १४४ ने पण मिळतो. आणि याच महावाक्याचा आधार घेत ह. अबुबकर सिद्दीक ؓ नी सुध्दा लोकांमध्ये आपण ﷺ चा मृत्यू वास्तविक आहे असे सांगितले. म्हणून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत अशी धारणा ठेवणे की, आपण ﷺ ला बर्जखमध्ये बिल्कुल तसेच जीवन प्राप्त आहे, ज्याप्रमाणे जगांत प्राप्त होते. हे कुरआनच्या स्पष्ट महावाक्यांच्या विरुध्द आहे. आपण ﷺ वर सुध्दा दुसऱ्या मानवांसारखाच मृत्यू आला. म्हणूनच आपल्याला दफन करण्यात आले. कबरमध्ये आपल्याला बर्जखी जीवन तर नक्कीच प्राप्त आहे. ज्याच्या अवस्थेचे आम्हांस ज्ञान नाही. परंतु दुसऱ्यादा कबरमध्ये आपणास ऐहिक जीवन बहाल केले गेले नाही. सल्लल्लाहु अलैहि व सल्लम.

فَمَنْ أَظْلَمُ مِمَّنْ كَذَبَ عَلَى اللَّهِ وَكَذَّبَ بِالصِّدْقِ إِذْ
جَاءَهُ ۚ أَلَيْسَ فِي جَهَنَّمَ مَثْوًى لِلْكَافِرِينَ ٣٢

याच्यापेक्षा मोठा जालीम कोण आहे, जो अल्लाहतआलावर खोटे बोलेल.[१] आणि खरा धर्म जेव्हा त्याच्याजवळ येईल, तर त्याला खोटे म्हणेल[२] काय अशा काफिरांचे ठिकाण नरकाग्नीमध्ये नव्हे? ३२

وَالَّذِي جَاءَ بِالصِّدْقِ وَصَدَّقَ بِهِ ۙ أُولَٰئِكَ هُمُ
الْمُتَّقُونَ ٣٣

आणि जे लोक सत्य धर्माला अनुसरले[३] आणि जे त्याला खरा जाणतील,[४] हेच लोक अल्लाहला भिऊन वागणारे आहेत. ३३

لَهُمْ مَا يَشَاءُونَ عِنْدَ رَبِّهِمْ ۚ ذَٰلِكَ جَزَاءُ الْمُحْسِنِينَ ٣٤

त्यांच्याकरीता त्यांच्या पालनकर्त्याजवळ प्रत्येक ती वस्तू आहे, जी ते इच्छतील.[५] सुकृत्ये करणारांचा हाच मोबदला आहे.[६] ३४

لِيُكَفِّرَ اللَّهُ عَنْهُمْ أَسْوَأَ الَّذِي عَمِلُوا وَيَجْزِيَهُمْ أَجْرَهُمْ
بِأَحْسَنِ الَّذِي كَانُوا يَعْمَلُونَ ٣٥

हे यासाठी की, अल्लाहतआलाने त्यांच्यापासून त्यांच्या वाईट कर्मांना दूर करून द्यावे, आणि जी चांगली कर्मे त्यांनी केली आहेत, त्यांचा चांगला मोबदला त्यांना द्यावा ३५

أَلَيْسَ اللَّهُ بِكَافٍ عَبْدَهُ ۖ وَيُخَوِّفُونَكَ بِالَّذِينَ مِنْ دُونِهِ ۚ
وَمَنْ يُضْلِلِ اللَّهُ فَمَا لَهُ مِنْ هَادٍ ٣٦

काय अल्लाहतआला आपल्या सेवकांसाठी पुरेसा नाही?[७] हे लोक आपणास अल्लाहच्या शिवाय दुसऱ्यांपासून भिववीत आहेत. आणि ज्याला अल्लाह गैरमार्गी लावेल तर त्याला रस्ता दाखविणारा कोणी नाही.[८] ३६

وَمَنْ يَهْدِ اللَّهُ فَمَا لَهُ مِنْ مُضِلٍّ ۗ أَلَيْسَ اللَّهُ بِعَزِيزٍ
ذِي انْتِقَامٍ ٣٧

आणि ज्याला तो हिदायत देईल त्याला कोणी बहकविणारा नाही.[९] काय अल्लाहतआला सामर्थ्यवान आणि सूड उगविणारा नाही?[१०] ३७

१) म्हणजे दावा करावा की, अल्लाहची संतती आहे. किंवा त्याचा पातीदार आहे. किंवा त्याची पत्नी आहे. वास्तविक पहाता, तो या सर्व गोष्टींपासून पवित्र आहे.

२) ज्याच्यांत एकेश्वरवाद आहे, आदेश आणि फर्ज आहेत, पुन्हा जिवंत होऊन उठण्याची आणि अल्लाहकडे परतून जाण्याची धारणा आहे. निषीद्ध गोष्टींपासून वांचणे आहे. ईमानवाल्यांसाठी शुभवर्तमान आणि काफिरांकरीतां धमकावण्या आहेत. हा धर्म आणि धर्मशास्त्र जे हजरत मोहम्मद ﷺ घेऊन आलेत, त्याला त्यांनी खोटे म्हणावे.

३) याच्याने इस्लामचे पैगंबर ह.मोहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, अभिप्रेत आहेत. जे सत्यधर्म घेऊन आलेत. काहींजवळ हे सर्वांसाठी आहे आणि याच्याने प्रत्येक तो मनुष्य अभिप्रेत आहे, जो एकेश्वरवादाचे आमंत्रण देतो आणि अल्लाहच्या धर्मशास्त्राकडे लोकांचे मार्गदर्शन करतो.

४) काहींनी याच्याने ह.अबूबकर सिद्दीक ؓ अभिप्रेत धरले आहेत. ज्यांनी सर्वांत प्रथम रसूलुल्लाह् सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला खरे मानले. आणि त्यांच्यावर ईमान आणले. काहींनी याला पण सर्व साधारण ठेवले आहे. ज्याच्यात सर्व ईमानवाले शामील आहेत, जे रसूलुल्लाह् ﷺ च्या पैगंबरीवर ईमान ठेवतात आणि आपणास खरे मानतात.

५) म्हणजे अल्लाहतआला त्यांचे अपराध क्षमा करून टाकेन, त्यांचे दर्जेपण उंच करून टाकेन. कारण प्रत्येक मुसलमानाची अल्लाहकडून हिच इच्छा असते. याशिवाय स्वर्गांत गेल्यानंतर, प्रत्येक वांच्छित वस्तू पण मिळेल.

६) 'मुहसिनीन' चा एक भावार्थ तर हा आहे, जे पुण्य कर्मे करणारे आहेत. दुसरा, ते जे प्रांजलपणे अल्लाहची उपासना करतात. जशी हदीसमध्ये 'एहसान' ची व्याख्या केली गेली आहे. ''तुम्ही अल्लाहची उपासना अशा प्रकारे करा की, जणू तुम्ही त्यांस पहात आहात, जर ही कल्पना शक्य होत नसेल, तर हे जरूर लक्षात रहावे की, तो तुम्हास पहात आहे.'' तिसरा, जे लोकांबरोबर चांगली वागणूक आणि सौजन्याने वागतात. चवथा, प्रत्येक सुकृत्याला चांगल्या पद्धतीने, विनयशिलतेने आणि सुन्नते नबवी ﷺ प्रमाणे करतात. भरपूर करण्याऐवजी याच्यात 'चांगले' करण्याचा विचार करतात.

७) याच्याने अभिप्रेत नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत. काहींच्या जवळ हे सर्व साधारण आहे. सर्व पैगंबर आणि ईमानवाले यांच्यात अंतर्भुत होतात. अर्थ हा आहे की, आपणास ﷺ अल्लाहशिवाय इतरापासून भिववितात. परंतु अल्लाहतआला जेव्हा आपला पुरस्कर्ता आणि मददगार आहे, तर आपले कोणी काहीच वाकडे करू शकत नाही. तो या सर्वांच्या मुकाबल्यात आपणांस पुरेसा आहे.

८) जो याला बहकण्यातून काढून, हिदायतच्या मार्गाला लाऊन देईल.

९) जो याला हिदायतमधून काढून, बहकण्याच्या खाईत लोटून देईल. म्हणजे हिदायत आणि बहकणे अल्लाहच्या हातात आहे. ज्याला इच्छील बहकवून टाकील, आणि ज्याला इच्छील त्याला हिदायत बहाल करील.

१०) का नाही? अवश्य आहे!! म्हणून जर हे लोक कुफ्र आणि अहंकारापासून परावृत्त झाले नाही तर खचित्‌च तो आपल्या मित्रांच्या पुरस्कारामध्ये, त्यांच्याकडून सूड उगवील. आणि त्यांना धडा घेण्यासारख्या परिणामात व्यस्त करील.

وَلَئِنْ سَاَلْتَهُمْ مَّنْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ لَيَقُوْلُنَّ اللّٰهُ ۭ قُلْ اَفَرَءَيْتُمْ مَّا تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ اِنْ اَرَادَنِيَ اللّٰهُ بِضُرٍّ هَلْ هُنَّ كٰشِفٰتُ ضُرِّهٖٓ اَوْ اَرَادَنِيْ بِرَحْمَةٍ هَلْ هُنَّ مُمْسِكٰتُ رَحْمَتِهٖ ۭ قُلْ حَسْبِيَ اللّٰهُ ۭ عَلَيْهِ يَتَوَكَّلُ الْمُتَوَكِّلُوْنَ ﴿٣٨﴾

**जर आपण त्यांना विचाराल की, आकाश आणि पृथ्वीला कोणी निर्माण केले आहे? तर खचितच ते हेच उत्तर देतील की, अल्लाहने. आपण त्यांना विचारा बरे! हे तर सांगा, ज्यांना तुम्ही अल्लाहच्या शिवाय बोलावितात, जर अल्लाहतआला मला नुकसान पोहचवू इच्छील, तर काय हे त्या नुकसानाला दूर करू शकतात? किंवा अल्लाहतआला माझ्यावर दया करण्याचा इरादा करील, तर काय हे त्याच्या दयेला अडवू शकतात? आपण सांगून टाका की अल्लाह मला पुरेसा (१) आहे! भरोसा करणारे याच्यावरच भरोसा करतात. (२) (३८)**

قُلْ يٰقَوْمِ اعْمَلُوْا عَلٰي مَكَانَتِكُمْ اِنِّىْ عَامِلٌ ۚ فَسَوْفَ تَعْلَمُوْنَ ﴿٣٩﴾ۙ

**सांगून द्या की, हे माझ्या लोकांनो! तुम्ही आपल्या परीने कर्म करीत रहा मी पण कर्म करीत आहे. (३) लवकरच तुम्हास ठाऊक होऊन जाईल (३९)**

مَنْ يَّاْتِيْهِ عَذَابٌ يُّخْزِيْهِ وَيَحِلُّ عَلَيْهِ عَذَابٌ مُّقِيْمٌ ﴿٤٠﴾

**की, कोणावर फजिती करणारी शिक्षा येते (४) आणि कोणावर कायमचा मार आणि नित्याची शिक्षा येते (५) (४०)**

اِنَّآ اَنْزَلْنَا عَلَيْكَ الْكِتٰبَ لِلنَّاسِ بِالْحَقِّ ۚ فَمَنِ اهْتَدٰى فَلِنَفْسِهٖ ۚ وَمَنْ ضَلَّ فَاِنَّمَا يَضِلُّ عَلَيْهَا ۚ وَمَآ اَنْتَ عَلَيْهِمْ بِوَكِيْلٍ ﴿٤١﴾ۧ

**आपल्यावर आम्ही सत्त्यासह हे पुस्तक लोकांकरीता अवतरित केले आहे. तर जो मनुष्य सरळ मार्गाला लागून जाईल, त्याचा आपलाच फायदा आहे. आणि जो आडमार्गी भटकून जाईल, तर त्याचे भटकणे, त्याच्यावरच आहे. तू त्यांच्यावर काही जबाबदार नाही. (६) (४१)**

१) काही म्हणतात की, जेव्हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी चर्चित प्रश्नाला त्यांच्यासमोर सादर केले, तेव्हां त्यांनी म्हटले की, खरोखर ते अल्लाहने ठरविलेल्या गोष्टीला टाळूशकत नाहीत; तथापि ते शिफारस करतील; ज्यावर हा महावाक्याचा भाग अवतरीत झाला की, मला तर माझ्या बाबतीत अल्लाहच पुरेसा आहे.

२) जेव्हा सर्व काही त्याच्याच अखत्यारात आहे, तर दुसऱ्यावर भरोसा करण्याचा काय फायदा? म्हणून ईमानवाले फक्त त्याच्यावरच भरोसा करतात. त्याच्याशिवाय कोणावर त्यांचा भरोसा नाही.

३) म्हणजे जर तुम्ही माझ्या एकेश्वरवादाच्या आवाहनाला मान्य करीत नाही, ज्याच्यासाठी अल्लाहने मला पाठविले आहे, तर ठिक आहे, तुमची मर्जी. तुम्ही आपल्या याच स्थितीवर कायम रहा, ज्यावर तुम्ही आहात, मी त्या स्थितीवर रहातो, ज्यावर मला अल्लाहतआलाने ठेवले आहे.

४) ज्याने स्पष्ट होऊन जाईल की, सत्त्यावर कोण आहे, आणि असत्त्यावर कोण? याच्याने अपेक्षित जगातील शिक्षा आहे, जसे की बद्रच्या युद्धात झाले; काफिरांची सत्तर माणसे ठार, आणि सत्तरच माणसे कैदी झालीत. येथपावेतो की, मक्केच्या विजयानंतर वर्चस्व पण मुसलमानांनाच प्राप्त झाले. ज्याच्यानंतर काफिरांकरीता फजिती आणि अपमानाशिवाय काही बाकी राहिले नाही.

५) याच्याने अभिप्रेत नरकाग्नीची शिक्षा आहे. जिच्यात काफिर नित्य ग्रस्त राहतील.

६) नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला, मक्केवाल्यांचे कुफ्रवर अडीग रहाणे, फारच वाईट वाटत असे. याच्यात आपली सांत्वना करण्यांत आली आहे की, आपले काम फक्त या पुस्तकाला वर्णन करून सांगणे आहे, जे आम्ही आपल्यावर अवतरित केले आहे. त्यांच्या हिदायतसाठी आपण जबाबदार नाहीत. जर हे हिदायतचा मार्ग अनुसरतील, तर त्यात त्यांचाच फायदा आहे. आणि जर त्यांनी असे केले नाही, तर स्वत:चेच नुकसान करून घेतील. वकीलचा अर्थ जबाबदार आहे. म्हणजे आपण त्यांच्या हिदायतला जबाबदार नाही. पुढील महावाक्यात अल्लाहतआला आपले एक पूर्ण सामर्थ्य आणि एका विचित्र कारागिरीची चर्चा करीत आहे, ज्याचा अनुभव दररोज मनुष्य घेतो. आणि तो हा आहे की, जेव्हा तो झोपून जातो, तेव्हा त्याचा आत्मा जणूअल्लाहच्या हुकूमाने निघून जातो. कारण की त्याची जाणीव क्षमता संपून जाते. आणि जेव्हा तो जागा होतो, तर आत्मा जणू दुसऱ्यादा त्याच्यात पाठवून दिला जातो. ज्यामुळे त्याची शुद्ध, पूर्वीसारखी होऊन जाते. तथापि, ज्याच्या जीवनाचे दिवस भरून जातात. त्याचा आत्मा परत येत नाही. आणि तो मृत्यू पावतो. याला काही भाष्यकारांनी मोठा मृत्यू आणि लहान मृत्यूने पण संबोधित केले आहे.

ٱللَّهُ يَتَوَفَّى ٱلْأَنفُسَ حِينَ مَوْتِهَا وَٱلَّتِى لَمْ تَمُتْ فِى مَنَامِهَا ۖ فَيُمْسِكُ ٱلَّتِى قَضَىٰ عَلَيْهَا ٱلْمَوْتَ وَيُرْسِلُ ٱلْأُخْرَىٰٓ إِلَىٰٓ أَجَلٍ مُّسَمًّى ۚ إِنَّ فِى ذَٰلِكَ لَءَايَٰتٍ لِّقَوْمٍ يَتَفَكَّرُونَ ﴿٤٢﴾

**अल्लाहच आत्म्यांना (रुह) त्यांच्या मृत्यूच्या वेळी, [१] आणि ज्यांना मृत्यु आलेला नाही, त्यांच्या झोपेच्या वेळी, हरण करून घेतो; [२] मग ज्यांच्यावर मृत्यूचा हुकूम लागू होऊन चुकला आहे, त्यांना तर अडवून ठेवतो; [३] आणि दुसऱ्या आत्म्यांना (रुह) एका निश्चित वेळेपर्यंत सोडून देतो. [४] मनन करणाऱ्यांसाठी याच्यात खचित्‌च पुष्कळशा निशाण्या आहेत[५] ४२**

أَمِ ٱتَّخَذُوا۟ مِن دُونِ ٱللَّهِ شُفَعَآءَ ۚ قُلْ أَوَلَوْ كَانُوا۟ لَا يَمْلِكُونَ شَيْـًٔا وَلَا يَعْقِلُونَ ﴿٤٣﴾

**काय या लोकांनी अल्लाहतआलाच्या शिवाय (इतरांना) शिफारशी बनवून ठेवले आहे? आपण सांगून द्या की, जरी ते काहीही अधिकार बाळगत नसतील, आणि काहीच समजत नसतील[६] ४३**

قُل لِّلَّهِ ٱلشَّفَٰعَةُ جَمِيعًا ۖ لَّهُۥ مُلْكُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلْأَرْضِ ۖ ثُمَّ إِلَيْهِ تُرْجَعُونَ ﴿٤٤﴾

**सांगून द्या की, सर्व शिफारशी तर अल्लाहच्याच अखत्यारीत आहेत. [७] सर्व आकाश आणि पृथ्वीचे राज्य त्याच्याकरता आहे. तुम्ही सर्व त्याच्याचकडे परतून आणले जाल. ४४**

وَإِذَا ذُكِرَ ٱللَّهُ وَحْدَهُ ٱشْمَأَزَّتْ قُلُوبُ ٱلَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِٱلْءَاخِرَةِ ۖ وَإِذَا ذُكِرَ ٱلَّذِينَ مِن دُونِهِۦٓ إِذَا هُمْ يَسْتَبْشِرُونَ ﴿٤٥﴾

**जेव्हा अल्लाह एकट्याचेच नाव घेतले जाते, तेव्हा त्या लोकांची मने तिरस्कार करू लागतात; [८] जे परलोकाचा विश्वास बाळगत नाही. आणि जेव्हा त्याच्याशिवाय (इतरांचा) उल्लेख केला जाईल, तर त्यांची मने प्रसन्न होऊन आनंदीत होऊन जातात. [९] ४५**

१) हा मोठा मृत्यू आहे की, आत्मा हरण करून घेतले जातात, ते परत येत नाही.

२) म्हणजे ज्यांच्या मृत्यूची वेळ अजून आली नाही, तर झोपण्यांच्या वेळी त्यांचे आत्मा पण हरण करून, त्यांना लहान मृत्यूत व्यस्त करून दिले जाते.

३) हाच तो मोठा मृत्यू आहे ज्याचा उल्लेख आतां केला गेला की, त्यात आत्मा अडवून ठेवण्यात येतो.

४) म्हणजे जोपर्यंत त्यांचा ठराविक वेळ येत नाही, त्या वेळेपर्यंत त्यांचे आत्मे परत येत असतात. हा लहान मृत्यु आहे. हाच विषय सू.अन्आम ६०-६१ मध्ये वर्णन केला गेला आहे. तथापि तेथे लहान मृत्यूचा उल्लेख प्रथम, आणि मोठ्या मृत्यूचा नंतर आहे. जेव्हा की, येथे याच्या उलट आहे.

५) म्हणजे हे आत्मांचे हरण करणे आणि त्याचे परत पाठविणे, आणि 'तवफ्फी' (मृत्यू) व 'अहयाअ' (जीवन देणे) यात या गोष्टींचे प्रमाण आहे की, अल्लाहतआला सर्व गोष्टींवर समर्थ आहे. आणि कयामतच्या दिवशी तो मृतांना पण खचित्‌च जिवंत करीन.

६) म्हणजे शिफारशीचा अधिकार तर कोठे, त्यांना तर शिफारशीचा अर्थ आणि भावार्थाचा पण पत्ता नाही. कारण की, ते दगड किंवा अजाण आहेत.

७) म्हणजे शिफारशींच्या सर्व प्रकारांचा मालक फक्त अल्लाहच आहे. त्याच्या परवानगी शिवाय कोणी शिफारसच करूशकणार नाही. तर मग एकाच अल्लाहची उपासना का केली जाऊ नये? कारण की, त्याने राजी होऊन जावे. आणि शिफारशी करीता, कोणी आधार शोधण्याची आवश्यकताच न रहावी.

८) किंवा कुफ्र आणि अहंकार किंवा त्यांना मनात संकोचाची जाणीव होते. अर्थ हा आहे की, मुशरिकीन लोकांना जेव्हा हे सांगितले जाते की, उपास्य फक्त एकच आहे, तर त्यांची मने ही गोष्ट मानावयास तयार होत नाही.

९) होय, परंतु जेव्हा हे सांगितले जाईल की, अमुक अमुक पण उपास्य आहे, किंवा ते पण शेवटी अल्लाहचे पुण्यशील सेवक आहेत, ते पण काही अधिकार बाळगतात; ते पण संकट निवारण आणि इच्छापूर्ती करूशकतात; तर तेव्हा मुशरिक लोक फार खूष होतात. मिथ्यावादींची आजपण हिच स्थिती आहे. जेव्हा त्यांना सांगण्यात येईल की, फक्त 'या अल्लाह मदद', म्हणा की, याच्याशिवाय कोणी पण मदत करण्यास समर्थ नाही. तेव्हा ते फारच नाराज होऊन जातात. हे म्हणणे त्यांच्यासाठी फारच असह्य होऊन जाते. परंतु जेव्हा ''या अली मदद'' किंवा ''या रसूलुल्लाह् मदद'' म्हटले जाईल, अशा प्रकारे दुसऱ्या मृतांशी मदत आणि दाद मागितली जाईल, उदाहरणार्थ ''या शेख अब्दुल् कादिर शयअन् लिल्लाह्'' वगैरे तर त्यांच्या मनाची कळी खुलून उठते. ''फतशा बअस् कुलुबहुम'' नंतरच्या मुशरीकीनींचे अंत:करणे पण पूर्वीच्या मुशरिकीन प्रमाणे होऊन गेले.

قُلِ اللّٰهُمَّ فَاطِرَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ عٰلِمَ الْغَيْبِ وَالشَّهَادَةِ اَنْتَ تَحْكُمُ بَيْنَ عِبَادِكَ فِيْ مَا كَانُوْا فِيْهِ يَخْتَلِفُوْنَ ﴿٤٦﴾

**आपण म्हणा की, हे अल्लाह! आकाशे आणि पृथ्वीच्या निर्माणकर्त्या गुप्त आणि उघडाला जाणणाऱ्या, तूच आपल्या सेवकांमध्ये त्या गोष्टींचा निर्णय करशील, ज्यात ते मतभेद करीत होते.[१] (४६)**

وَلَوْ اَنَّ لِلَّذِيْنَ ظَلَمُوْا مَا فِي الْاَرْضِ جَمِيْعًا وَّمِثْلَهٗ مَعَهٗ لَافْتَدَوْا بِهٖ مِنْ سُوْٓءِ الْعَذَابِ يَوْمَ الْقِيٰمَةِ ؕ وَبَدَا لَهُمْ مِّنَ اللّٰهِ مَا لَمْ يَكُوْنُوْا يَحْتَسِبُوْنَ ﴿٤٧﴾

**जर जुलूम करणाऱ्यापाशी, ते सर्व काही असेल, जे जमिनीच्या पृष्ठभागावर आहे, आणि त्याच्या बरोबर इतकेच आणखी असेल, तरी सुद्धा वाईट शिक्षेच्या बदल्यात, कयामतच्या दिवशी हे सर्व काही देऊन टाकतील.[२] आणि त्यांच्या समोर अल्लाहकडून ते जाहीर होईल, ज्यांची त्यांना कल्पना पण नव्हती.[३] (४७)**

وَبَدَا لَهُمْ سَيِّاٰتُ مَا كَسَبُوْا وَحَاقَ بِهِمْ مَّا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ﴿٤٨﴾

**जे काही त्यांनी केले होते, त्याचे दुष्परिणाम त्यांच्यावर जाहीर होऊन जातील[४] आणि ज्याची ते थट्टा करीत होते, ते त्यांना येऊन घेरेल.[५] (४८)**

فَاِذَا مَسَّ الْاِنْسَانَ ضُرٌّ دَعَانَا ؗ ثُمَّ اِذَا خَوَّلْنٰهُ نِعْمَةً مِّنَّا ۙ قَالَ اِنَّمَآ اُوْتِيْتُهٗ عَلٰى عِلْمٍ ؕ بَلْ هِيَ فِتْنَةٌ وَّلٰكِنَّ اَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُوْنَ ﴿٤٩﴾

**मनुष्याला जेव्हा काही त्रास पोहचतो, तर आम्हास बोलावू लागतो;[६] मग जेव्हाआम्ही त्याला आपल्याकडून कोणी देणगी देऊन टाकतो तेव्हा म्हणू लागतो हे तर मला निव्वळ माझ्या अक्कलहुशारीने मिळाले आहे.[७] किंबहुना ही तर परीक्षा आहे.[८] परंतु यांच्यातून बहुतेक लोक जाणत नाहीत[९] (४९)**

قَدْ قَالَهَا الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ فَمَآ اَغْنٰى عَنْهُمْ مَّا كَانُوْا يَكْسِبُوْنَ ﴿٥٠﴾

**यांच्यापूर्वीचे पण हीच गोष्ट म्हणून चुकले आहेत. तर त्यांची अक्कल हुशारी त्यांच्या काही कामा आली नाही.[१०] (५०)**

१) हदीस मध्ये येते, नबी ﷺ रात्रीच्या तहज्जुदच्या नमाजीच्या सुरवातीला हे म्हणत असत, ''अल्लाहुम्मा रब्ब जिब्रईल व मिकाईल व इस्राफील. फातिरस्समावाति वल् अर्जी आलिमल गैब वश्शहादा अन्ता तहकुमु बयना इबादिका फिमा का नफिही यखतलेफून, इहदिनी लिम खतुलिफा फिही मिनल् हक्क बिइजनिका इन्नका तहदी मनत्शाअु इला सिरातिम् मुस्तकीम'' (स.मुस्लिम)

२) परंतु तरी सुद्धा ते मान्य होणार नाही. जसा की दुसऱ्या ठिकाणी खुलासा आहे. ''ते पृथ्वी भरुन सोने पण बदल्यात देऊन देतील तर ते मान्य केले जाणार नाही.'' (सू.आले इमरान-९१) यासाठी की, ''तेथे मोबदला कबूल केला जाणार नाही.'' (सू.अल्बकर : - ४८)

३) म्हणजे शिक्षेची तिव्रता आणि तिची भयानकता आणि तिचे निरनिराळे प्रकार असे असतील कधी त्यांना त्यांची कल्पना पण आली नसेल.

४) म्हणजे जगात ज्या मना केलेल्या गोष्टी आणि गुन्हे ते करीत होते त्यांची शिक्षा त्यांच्या समोर येऊन जाईल.

५) ती शिक्षा त्यांना घेरून घेईल, जिला जगात ते अशक्य समजत होते म्हणून तिची थट्टा करीत होते.

६) म्हणजे बहुतेक मनुष्यांची ही स्थिती आहे की, जेव्हा त्यांना आजार, दारिद्र्य आणि उपासमार किंवा आणखी कोणी त्रास पोहचतो, तर त्यापासून मुक्त होण्यासाठी, अल्लाहकडे दुआ करतो आणि त्याच्या समोर व्याकुळता दाखवितो.

७) म्हणजे देणगी मिळताच शिरजोरी आणि कृतघ्नतेचा मार्ग अनुसरतो. आणि म्हणतो यात अल्लाहचा काय उपकार? हा तर माझ्या अक्कल हुशारीचा परिणाम आहे. किंवा जे ज्ञान आणि कला माझ्या जवळ आहे, त्यामुळे मला या देणग्या मिळाल्या आहेत. किंवा मला ठाऊक होते की, जगात या गोष्टी मला मिळणारच कारण की, अल्लाहजवळ माझे फार उच्च स्थान आहे.

८) म्हणजे गोष्ट अशी नाही, जी तू समजत आहेस किंवा सांगत आहे. किंबहुना या देणग्या तुझ्यासाठी परीक्षा आणि कसोटी आहे की तूआभार मानतोस की कृतघ्नता दाखवितोस?

९) या गोष्टीकडून की, हे अल्लाहकडून सवलत आणि परीक्षा आहे.

१०) ज्याप्रमाणे कारून ने पण म्हटले होते; परंतु सरशेवटी तो आपल्या खजिन्यासह जमिनीत धसवून देण्यात आला. ''फमा अगना' मध्ये 'मा' प्रश्नात्मक पण असू शकतो आणि नकारात्मक सुद्धा. दोन्ही प्रकारे अर्थ बरोबर आहे.

فَاَصَابَهُمْ سَيِّاٰتُ مَا كَسَبُوْا ؕ وَالَّذِيْنَ ظَلَمُوْا مِنْ هٰٓؤُلَآءِ
سَيُصِيْبُهُمْ سَيِّاٰتُ مَا كَسَبُوْا ۙ وَمَا هُمْ بِمُعْجِزِيْنَ ﴿٥١﴾

**मग त्यांची सर्व दुष्कृत्ये (१) त्यांच्यावरच येऊन पडतील; आणि त्यांच्यातून पण जे गुन्हेगार आहेत, त्यांनी केलेली दुष्कृत्ये पण आता त्यांच्यावर येऊन पडतील. हे (आम्हास) हरवू शकणार नाहीत. (२) ५१**

اَوَلَمْ يَعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَنْ يَّشَآءُ وَيَقْدِرُ ؕ
اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّقَوْمٍ يُّؤْمِنُوْنَ ﴿٥٢﴾ ع ٥ ٢

**काय त्यांना हे ठाऊक नाही की, अल्लाहतआला ज्याच्याकरीता इच्छितो, त्याची रोजी वाढवून देतो आणि काटकसरीने पण देतो. ईमान आणाऱ्यासाठी यात, (मोठमोठ्या) निशाण्या आहेत (३) ५२** ع ५ २

قُلْ يٰعِبَادِيَ الَّذِيْنَ اَسْرَفُوْا عَلٰٓى اَنْفُسِهِمْ لَا تَقْنَطُوْا مِنْ
رَّحْمَةِ اللّٰهِ ؕ اِنَّ اللّٰهَ يَغْفِرُ الذُّنُوْبَ جَمِيْعًا ؕ اِنَّهٗ هُوَ
الْغَفُوْرُ الرَّحِيْمُ ﴿٥٣﴾

**(माझ्याकडून) सांगून द्या की, हे माझ्या सेवकांनो! ज्यांनी आपल्या जिवावर जुलूम केला आहे, तुम्ही अल्लाहच्या दयेकडून निराश होऊ नका; नि:संशय अल्लाहतआला सर्व पापांना क्षमा करून टाकतो. खरोखर तो मोठा क्षमाकर्ता आणि दयाळूआहे. (४) ५३**

१) वाईटांनी अभिप्रेत त्यांच्या वाईट कृत्यांचा मोबदला आहे. त्यांच्या साम्यामुळे त्यांना गुन्हे म्हणण्यात आले आहे. नाही तर वाईटाचा बदला, वाईट नाही. जसे ''जजाअ सय्य्अतिन, सय्यअतून मिसलहा'' (सू. शुअरा-४०) मध्ये आहे. (फत्हुल कदीर)

२) ही मक्केच्या काफिरांना तंबी आहे. आणि झालेही असेच! हे पण मागील लोकसमूहाप्रमाणे, दुष्काळ, ठार मारले जाणे, किंवा कैदी बनणे, वगैरेंनी ग्रस्त झाले. अल्लाहकडून आलेल्या या शिक्षांना ते रोकू शकले नाहीत.

३) म्हणजे रोजीच्या भरपूर देण्यात किंवा काटकसरीने देण्यात सुद्धा अल्लाहच्या एकेश्वरवादाची प्रमाणे आहेत. म्हणजे याच्याने ठाऊक होते की, ब्रम्हाडांमध्ये फक्त त्याचाच हुकूम आणि हस्तक्षेप चालतो. त्याचीच युक्ती परिणामकारक आणि लागू पडणारी आहे. म्हणून तो ज्याला इच्छितो, त्याला भरपूर अन्न संपदा बहाल करतो. आणि ज्याला इच्छितो त्याला उपासमारीत आणि काटकसरीत व्यस्त करुन टाकतो. याच्या या निर्णयात, जो याच्या शहाणपणा आणि मर्जीवर अवलंबून आहे, त्यांत कोणी ढवळाढवळ करूशकत नाही. तसेच त्याला खंडीत किंवा रद्द करू शकत नाही. तथापि या निशाण्या फक्त ईमानवाल्यांसाठीच आहेत. कारण की तेच याच्यावर चिंतन आणि मनन करून त्यापासून फायदा उचलतात. आणि अल्लाहकडून क्षमादान प्राप्त करतात.

४) या महावाक्यात अल्लाहच्या क्षमेच्या विस्तृतपणाचे वर्णन आहे. 'इस्राफ' चा अर्थ आहे. पापांचे भरपूर असणे आणि त्यात मर्यादेच्या बाहेर निघून जाणे. ''अल्लाहच्या दयेकडून निराश होऊ नका.'' चा अर्थ आहे की, ईमान आणण्याच्या पूर्वी, किंवा पश्चात्ताप आणि क्षमा मागण्याची जाणीव होण्यापूर्वी, कितीही पाप केले असेल, तर माणसाने असे समजूं नये की मी तर फार मोठा पापी आहे. मला अल्लाह कशी काय क्षमा करील? परंतु खऱ्या मनाने जर ईमान कबूल करेल किंवा खरा पश्चात्ताप व्यक्त करेल, तर अल्लाहतआला तमाम पापांना क्षमा करून टाकीन. या महावाक्याच्या अवतरणाच्या रिवायतीने सुद्धा हा भावार्थ सिद्ध होतो. काही काफिर आणि मुशरिक होते, ज्यांनी भरपूर खून आणि व्याभिचार केले होते. ते नबी ﷺ च्या सेवेत हजर झालेत. आणि म्हणाले की आपले आवाहन बरोबर आहे. परंतु आम्ही लोक फारच जास्त गुन्हेगार आहोत. जर आम्ही ईमान आणले तर काय ते सर्व गुन्हे माफ होऊन जातील? ज्यावर हे महावाक्य अवतरीत झाले. (स.बुखारी तफसीर सू.जुमर) याचा हा अर्थ नाही की, अल्लाहच्या दया आणि क्षमेच्या आशेवर खूप अपराध केले जावेत, त्याच्या हुकूमांची आणि फर्जांची अजिबात पर्वा केली जाऊ नये. आणि त्याच्या मर्यादा आणि त्याने ठरविलेल्या गोष्टींना पायदळी तुडविले जावे. अशाप्रकारे त्याच्या प्रकोपाला आणि सूड उगविण्याला आवाहन देऊन, त्याच्या दया आणि क्षमेची आशा बाळगणे फारच मूर्खपणा आणि भ्रामक कल्पना करणे आहे. हे काटेरी झाडांची बी पेरून, मधुर फळफळादी चाखण्याची आशा बाळगण्यासारखे आहे. अशा लोकांना हे लक्षात ठेवावयास पाहिजे की, तो जेथे आपल्या सेवकांसाठी क्षमाकर्ता आणि दयाळू आहे; तेथे तो आज्ञाभंजकांसाठी सामर्थ्यवान आणि सूड उगविणारा सुद्धा आहे. म्हणून कुरआन करीममध्ये निरनिराळ्या ठिकाणी या दोन्ही बाजुंना बरोबर बरोबर वर्णन करण्यात आले. उदाहरणार्थ ''माझ्या सेवकांना सांगून द्या की मी क्षमाकर्ता आणि दयाळू आहे आणि माझी शिक्षा सुद्धा कठोर शिक्षा आहे.'' (सू.हिज्र-४९-५०) जवळ जवळ हेच कारण आहे की, या महावाक्याची सुरवात ''या इबादी'' (माझ्या सेवकांनो!) ने केली. ज्याच्याने हेच ठाऊक होते की, जो ईमान आणून आणि खरा पश्चात्ताप व्यक्त करून, खऱ्या अर्थाने त्याचा सेवक बनून जाईल, त्याची पापे जरी समुद्राच्या फेंसासारखी असतील तरी तो क्षमा करून टाकील; तो आपल्या सेवकांकरीता खचित्‌च क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. जशी हदीसमध्ये शंभर माणसांच्या खुन्याची गोष्ट आहे. (स.बुखारी, स.मुस्लिम)

وَاَنِيْبُوْٓا اِلٰى رَبِّكُمْ وَاَسْلِمُوْا لَهٗ مِنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِيَكُمُ الْعَذَابُ ثُمَّ لَا تُنْصَرُوْنَ ﴿٥٤﴾

तुम्ही (सर्व) आपल्या पालनकर्त्यासमोर वळा; आणि त्याचे आज्ञापालन करीत रहा. याच्यापूर्वी की तुमच्याजवळ शिक्षा येऊन पोहोचेल आणि मग तुमची मदत न केली जावी ५४

وَاتَّبِعُوْٓا اَحْسَنَ مَآ اُنْزِلَ اِلَيْكُمْ مِّنْ رَّبِّكُمْ مِّنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِيَكُمُ الْعَذَابُ بَغْتَةً وَّاَنْتُمْ لَا تَشْعُرُوْنَ ﴿٥٥﴾

आणि अनुकरण करा त्या उत्कृष्ट गोष्टीचे जी तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून अवतरीत केली गेली आहे; याच्यापूर्वी की तुमच्यावर अचानक शिक्षा येऊन जावी आणि तुम्हास तिची बातमी पण नसावी[१] ५५

اَنْ تَقُوْلَ نَفْسٌ يّٰحَسْرَتٰى عَلٰى مَا فَرَّطْتُّ فِيْ جَنْۢبِ اللّٰهِ وَاِنْ كُنْتُ لَمِنَ السّٰخِرِيْنَ ﴿٥٦﴾

(असे न व्हावे की) कोण्या मनुष्याने म्हणावे अरेरे! खेद आहे त्या गोष्टीवर की मी अल्लाहतआलाच्या बाबतीत कोताई केली;[२] किंबहुना मी तर हंसी उडवणाऱ्यांमध्येच राहिलो. ५६

اَوْ تَقُوْلَ لَوْ اَنَّ اللّٰهَ هَدٰىنِيْ لَكُنْتُ مِنَ الْمُتَّقِيْنَ ﴿٥٧﴾

किंवा म्हणावे जर मला अल्लाह हिदायत करता, तर मी सुद्धा अल्लाहला भिणाऱ्या लोकांमधून झालो असतो.[३] ५७

اَوْ تَقُوْلَ حِيْنَ تَرَى الْعَذَابَ لَوْ اَنَّ لِيْ كَرَّةً فَاَكُوْنَ مِنَ الْمُحْسِنِيْنَ ﴿٥٨﴾

किंवा शिक्षांना पाहून म्हणावे की, अरेरे कोण्या प्रकारे माझे परतून जाणे झाले असते तर मी पण सुकृत्ये करणारांमधून झालो असतो ५८

بَلٰى قَدْ جَآءَتْكَ اٰيٰتِيْ فَكَذَّبْتَ بِهَا وَاسْتَكْبَرْتَ وَكُنْتَ مِنَ الْكٰفِرِيْنَ ﴿٥٩﴾

होय! होय!! नि:संशय तुझ्याजवळ माझी महावाक्ये पोहचून चुकली होती. ज्याना तू खोटे ठरवलेस, आणि अहंकार व गर्व केला आणि तू होताच काफिरांमधून[४] ५९

وَيَوْمَ الْقِيٰمَةِ تَرَى الَّذِيْنَ كَذَبُوْا عَلَى اللّٰهِ وُجُوْهُهُمْ مُّسْوَدَّةٌ ؕ اَلَيْسَ فِيْ جَهَنَّمَ مَثْوًى لِّلْمُتَكَبِّرِيْنَ ﴿٦٠﴾

आणि ज्या लोकांनी अल्लाहवर खोटे कुभांड रचले आहे, तर आपण पहाल की कयामतच्या दिवशी त्यांचे चेहरे काळे होऊन जातील;[५] काय गर्व करणाऱ्यांचे ठिकाण नरकाग्नी नव्हे?[६] ६०

وَيُنَجِّي اللّٰهُ الَّذِيْنَ اتَّقَوْا بِمَفَازَتِهِمْ ۫ لَا يَمَسُّهُمُ السُّوْٓءُ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿٦١﴾

आणि जे लोक अल्लाहला भिऊन वागलेत, त्यांना अल्लाहतआला त्यांच्या साफल्यासह वांचवून घेईल;[७] त्यांना कुठलाही वाईट परिणाम स्पर्श ही करू शकणार नाही. न ते कोण्याप्रकारे दु:खी होतील[८] ६१

१) म्हणजे शिक्षा येण्याच्या पूर्वी तौबा आणि सुकृत्ये यांचा बंदोबस्त करून घ्या. कारण की जेव्हा शिक्षा येईल, तेव्हा तिचे ज्ञान आणि जाणीव पण तुम्हास असणार नाही. याच्याने अभिप्रेत ऐहिक शिक्षा आहे.

२) 'फी जंबिल्लाह्' चा अर्थ आहे, अल्लाहचे आज्ञापालन. म्हणजे कुरआन आणि त्याच्यावर अंमलबजावणी करण्यात कोताई आहे. किंवा 'जन्ब' चा अर्थ जवळीक आणि शेजारचा आहे. म्हणजे अल्लाहची जवळीक आणि त्याचा शेजार (म्हणजे स्वर्ग) इच्छण्यांत कोताई केली.

३) म्हणजे जर अल्लाहने मला हिदायत देऊन दिली असती, तर मी शिर्क आणि पापांपासून वाचून गेलो असतो. हे असेच आहे, जसे दुसऱ्या ठिकाणी मुशरिक लोकांचे म्हणणे नोंदविले आहे; ''जर अल्लाह इच्छिता तर आम्ही शिर्क केले नसते.'' (सु.अन्आम - १४८) त्यांचे हे म्हणणे ''कलेमता हक्किन, उरीदा बिहल बातिल'' म्हणजे ती गोष्ट तर आहे पण हिच्याने खोट्याला खरे ठरविण्याचा उद्देश आहे.

४) अल्लाहतआला त्यांच्या इच्छेच्या उत्तरात हे सांगेन.

५) ज्याचे कारण, शिक्षेची भयानकता आणि अल्लाहच्या प्रकोपाला प्रत्यक्ष अनुभवतील.

६) हदीसमध्ये आहे, ''सत्त्याला नाकारणे, आणि लोकांना क्षुल्लक समजणे गर्व आहे.'' ही पृच्छातोंडी आहे. म्हणजे अल्लाहच्या आज्ञापालनापासून गर्व करणाऱ्यांचे ठिकाण नरकाग्नी आहे.

७) 'मफाजतून' म्हणजे 'फव्ज' (सफलता) वाईटांपासून वांचून जाणे, आणि भलाई आणि चांगुलपणा प्राप्त होणे. अर्थ आहे, अल्लाहतआला त्याला भिऊन वागणाऱ्याच्या त्या सफलता आणि सुदैवांमुळे मुक्ती प्रदान करेल, जी अल्लाहजवळ त्यांच्यासाठी पूर्वीपासूनच शाबित आहे.

८) ते जगात जे काय सोडून आले आहेत, यावर त्यांना काही दु:ख होणार नाही. ते कारण की कयामतच्या भयानकतेपासून सुरक्षित असतील. म्हणून त्यांना कोण्या गोष्टींचे दु:ख होणार नाही.

ٱللَّهُ خَٰلِقُ كُلِّ شَيْءٍۖ وَهُوَ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ وَكِيلٌ ٦٢

अल्लाह प्रत्येक गोष्टीचा निर्माणकर्ता आहे; आणि तोच प्रत्येक वस्तुंवर रक्षण करणारा आहे. (१) ६२

لَّهُۥ مَقَالِيدُ ٱلسَّمَٰوَٰتِ وَٱلْأَرْضِۗ وَٱلَّذِينَ كَفَرُوا۟ بِـَٔايَٰتِ ٱللَّهِ أُو۟لَٰٓئِكَ هُمُ ٱلْخَٰسِرُونَ ٦٣

आकाशांच्या आणि पृथ्वीच्या किल्ल्यांचा मालक तोच आहे. (२) ज्या ज्या लोकांनी अल्लाहच्या महावाक्यांना नाकारले, तेच तोट्यांत आहेत (३) ६३

قُلْ أَفَغَيْرَ ٱللَّهِ تَأْمُرُوٓنِّىٓ أَعْبُدُ أَيُّهَا ٱلْجَٰهِلُونَ ٦٤

आपण सांगून द्या की, हे अज्ञानी लोकांनो! काय तुम्ही मला अल्लाहच्या शिवाय इतरांची उपासना करावयास सांगतात? (४) ६४

وَلَقَدْ أُوحِىَ إِلَيْكَ وَإِلَى ٱلَّذِينَ مِن قَبْلِكَ لَئِنْ أَشْرَكْتَ لَيَحْبَطَنَّ عَمَلُكَ وَلَتَكُونَنَّ مِنَ ٱلْخَٰسِرِينَ ٦٥

खचित्‌च तुझ्याकडे सुद्धा, आणि तुझ्या पूर्वीच्या (सर्व पैगंबरांकडे) सुद्धा, 'वह्य' केले गेले आहे की, जर तू शिर्क केलेस, तर यात काही संशय नाही की तुझे कर्म अक्रित होऊन जाईल आणि अवश्यच तू हानी भोगणाऱ्यापैकी होऊन जाशील (५) ६५

بَلِ ٱللَّهَ فَٱعْبُدْ وَكُن مِّنَ ٱلشَّٰكِرِينَ ٦٦

किंबहुना तू अल्लाहचीच उपासना कर; (६) आणि आभार मानणाऱ्यांमधून होऊन जा ६६

وَمَا قَدَرُوا۟ ٱللَّهَ حَقَّ قَدْرِهِۦ وَٱلْأَرْضُ جَمِيعًا قَبْضَتُهُۥ يَوْمَ ٱلْقِيَٰمَةِ وَٱلسَّمَٰوَٰتُ مَطْوِيَّٰتٌۢ بِيَمِينِهِۦۚ سُبْحَٰنَهُۥ وَتَعَٰلَىٰ عَمَّا يُشْرِكُونَ ٦٧

आणि या लोकांनी अल्लाहची जशी कदर करावयास पाहिजे होती, तशी केली नाही. (७) सर्व पृथ्वी कयामतच्या दिवशी त्याच्या मुठीत असेल, आणि आकाश त्याच्या उजव्या हातात, गुंडाळलेले असेल. (८) तो पवित्र आणि थोर आहे, प्रत्येक त्या गोष्टींपासून जिला लोक त्याचा सरकतदार बनवितात. ६७

وَنُفِخَ فِى ٱلصُّورِ فَصَعِقَ مَن فِى ٱلسَّمَٰوَٰتِ وَمَن فِى ٱلْأَرْضِ إِلَّا مَن شَآءَ ٱللَّهُۖ ثُمَّ نُفِخَ فِيهِ أُخْرَىٰ فَإِذَا هُمْ قِيَامٌ يَنظُرُونَ ٦٨

आणि सूर फुकून दिला जाईल, तेव्हाआकाश आणि पृथ्वीवाले सर्व बेशुद्ध होऊन पडतील; (९) परंतु ज्याला अल्लाह इच्छील. (१०) मग दुसऱ्यादा सूर फुंकला जाईल, मग ते एकदम उभे राहून, पाहू लागतील (११) ६८

وَأَشْرَقَتِ ٱلْأَرْضُ بِنُورِ رَبِّهَا وَوُضِعَ ٱلْكِتَٰبُ وَجِا۟ىٓءَ بِٱلنَّبِيِّۦنَ وَٱلشُّهَدَآءِ وَقُضِىَ بَيْنَهُم بِٱلْحَقِّ وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ٦٩

आणि पृथ्वी आपल्या पालनकर्त्याच्या प्रकाशाने झगमगू लागेल. (१२) कर्मपत्र हजर केले जातील. पैगंबर आणि साक्षीदारांना आणले जाईल. (१३) आणि लोकांच्या दर्म्यान खरे खरे फैसले करून टाकले जातील; आणि त्यांच्यावर जुलूम केला जाणार नाही (१४) ६९

وَوُفِّيَتْ كُلُّ نَفْسٍ مَّا عَمِلَتْ وَهُوَ أَعْلَمُ بِمَا يَفْعَلُونَ ٧٠

आणि ज्या मनुष्याने जे काही केले आहे, भरपूर देऊन दिले जाईल. जे काही लोक करीत आहे तो त्याच्याशी खूप वाकब आहे. (१५) ७०

१) म्हणजे प्रत्येक वस्तुचा निर्मातापण तोच आहे. आणि मालक सुद्धा तोच. तो ज्याप्रकारे इच्छील त्यात दखल आणि युक्ती करीन. प्रत्येक वस्तू त्याच्या अधिन आणि त्याच्या दखलास पात्र आहे. कोणाला डोके वर उचलण्याची किंवा नकाराची हिंमत नाही. वकील, संरक्षणकर्ता या अर्थात, आणि प्रयुक्ती करणारा. प्रत्येक वस्तू त्याच्या हवाली आहे. आणि तो कोणाच्या भागीदारी शिवाय त्यांचे संरक्षण आणि नियोजन करीत आहे.

२) मकालीद, मिकलीद आणि मिकलादचे अनेकवचन आहे. किंवा असे अनेकवचन आहे, ज्याचे एकवचन नाही. जसे असातीर आहे. (फत्हुल कदीर) काहींनी याचे भाषांतर 'किल्ल्या' आणि काहींनी 'खजिने' असे केले आहे. अर्थ दोन्ही स्वरूपात एकच आहे. सर्व मामल्यांचा करण्याचा अधिकार त्याच्याच हातात आहे.

३) म्हणजे पूर्ण घाटा. कारण की या कुफ्रच्या परिणामात ते नरकाग्नीत चालले गेले.

४) हे काफिरांच्या त्या आवाहनाच्या उत्तरात आहे, जे ते इस्लामचे पैगंबर ह.मोहम्मद रसूलुल्लाह ﷺ ला करीत असत. की, आपल्या वाडवडीलांच्या धर्माला मान्य करून घ्या; ज्यात मूर्तींची उपासना होती.

५) ''जर तू शिर्क केलेस.'' चा अर्थ आहे, जर मृत्यू शिर्कवर आला. आणि यापासून तौबा केली नाही. संबोधन जरी रसूलुल्लाह ﷺ आहे, जे शिर्कपासून पवित्र पण होते. आणि भविष्यासाठी सुरक्षित सुद्धा. कारण की पैगंबर अल्लाहच्या

संरक्षणात आणि सदाचरणी असतो, त्याच्याकडून शिर्क होण्याची काही शक्यता नव्हती. परंतु हे खरे म्हणजे उम्मतला सावध करणे आणि समजावण्याचा उद्देश्य आहे.

६) 'इय्याका नअ्बुदू' प्रमाणे येथे पण मफऊल (अल्लाह) ला पुढे ठेऊन घेरण्याचा भावार्थ निर्माण करून दिला गेला की, फक्त एका अल्लाहची उपासना करा!

७) कारण की याची गोष्ट पण मानली नाही, जी त्याने पैगंबरांच्या मार्फत त्यांच्यापर्यंत पोहोचवली होती. आणि उपासनापण निव्वळ त्याच्याच करीता केली नाही. किंबहुना दुसऱ्यांना पण त्याच्यात शामिल करून घेतले, हदीसमध्ये येते की, एक यहूदी विद्वान नबी ﷺ च्या सेवेत आला, आणि म्हणाला की, आम्ही अल्लाहच्या बाबतीत (पुस्तकांमध्ये) ही गोष्ट पहातो की तो (कयामतच्या दिवशी) आकाशांना एका बोटावर, पृथ्वींना एका बोटावर, वृक्षांना एका बोटावर पाणी आणि ओलाव्याला एका बोटावर आणि सर्व सृष्टीला एका बोटावर ठेऊन घेईल, आणि म्हणेन मी बादशाह आहे.'' आपण स्मित करून त्याचे म्हणणे मान्य केले. आणि महावाक्य 'वमा कद्ररुल्लाह्' चे पठण केले. (सहीह बुखारी तफसीर सू.जुमर) मुहद्दिसीन आणि सल्फ ची धारणा आहे की, अल्लाहच्या ज्या वैशिष्टांचा उल्लेख कुरआन आणि सहीह हदीशींमध्ये आहे, (ज्याप्रमाणे या महावाक्यात हाताचा आणि हदीशींमध्ये बोटांच्या शाबीतीचा आहे) याच्यावर कुठलाही का व कसे, आणि शंकेकुशंकेशिवाय, आणि त्याच्यांत वेगवेगळे अर्थ काढणे, व त्याला बदलून टाकणे याशिवाय ईमान ठेवणे आवश्यक आहे. म्हणून येथे वर्णन केलेल्या हकीकतीला फक्त शक्तीत आणि वरचढ होण्याच्या भावार्थांत घेणे बरोबर नाही.

८) याच्या बाबतीत हदीसमध्ये येते की, मग अल्लाहतआला फर्माविल ''मी बादशाह आहे. जमिनीचे बादशाह आज कुठे आहेत?

९) काहींच्या जवळ (नफका फजअच्या नंतर हा दुसरा सूर (नफका-म्हणजे कर्कश आवाजात सूर फुंकणे) म्हणजे तीव्र आवाजाचा सूर आहे, ज्यामुळे सर्वांचा मृत्यू घडून येईल. काहींच्या जवळ हा पहिलाच सूर आहे. याच्याने सुरवातीला फार घबराट निर्माण होईल. मग सर्वांचा मृत्यू घडून येईल. काहींनी या सुरांची क्रमवारी अशा प्रकारे केली आहे. पहिला मृत्यूचा, दुसरा सूर पुन्हा जिवंत होऊन उठण्याचा, तिसरा सूर सअकचा, चौथा सूर सकल जगाच्या पालनकर्त्याच्या स्थानापन्न होण्याचा. (अयसरुत्तफासीर) काहींजवळ फक्त दोनच सूर आहेत. मृत्यूचा सूर आणि जिवंत होऊन उठण्याचा सूर. आणि काही जवळ तीन. वल्लाहु अअ्लम!

१०) म्हणजे ज्यांना अल्लाह इच्छील त्यांना मृत्यू येणार नाही. जसे जिब्रईल, मिकाईल आणि इसराफील. काही म्हणतात रिजवान देवदूत, महासिंहासनाला उचलणारे देवदूत, आणि स्वर्ग आणि नर्कावर नियुक्त केलेले पहारेदार (फत्हुल कदीर)

११) चार सुरांच्या मानणाऱ्यांच्या जवळ हा चवथा, तीन सूर मानणाऱ्यांच्या जवळ तिसरा आणि दोन सूर मानणाऱ्यांच्या जवळ हा दुसरा सूर आहे. तथापि या सुराने सर्व जिवंत होऊन महशरच्या मैदानांत सकल जगांच्या पालनकर्त्या समक्ष हजर होऊन जातील; जेथे (कर्मांचा) लेखा जोखा होईल.

१२) या प्रकाशाने काहींनी न्याय आणि काहींनी हुकूम अभिप्रेत धरला आहे. परंतु याला खऱ्या अर्थांत घेण्याचे काहीच हरकत नाही. कारण की अल्लाह आकाश आणि पृथ्वीचा प्रकाश आहे. (फत्हुल कदीर)

१३) पैगंबरांना विचारले जाईल की तुम्ही माझा संदेश आपापल्या उम्मतींना पोहचून दिला होता? किंवा हे विचारले जाईल की, तुमच्या उम्मतींनी तुमच्या आवाहनाला काय उत्तर दिले, त्याला मान्य केले की, त्याला नाकारले? ह.मोहम्मद ﷺ च्या उम्मतीला साक्षीदार म्हणून आणले जाईल. जी या गोष्टीची साक्ष देईल की, तुझ्या पैगंबराने तुझा संदेश आपआपल्या लोकांना किंवा उम्मतींना पोहचवून दिला होता. जसे की तू आम्हास आपल्या कुरआनाच्या मार्फत या घटनांची माहिती करून दिली होतीस.

१४) म्हणजे कोणाच्या मोबदल्यात आणि पुण्यप्रतिफळांत कमी केले जाणार नाही. आणि कोणाला त्याच्या अपराधापेक्षा जास्त शिक्षा दिली जाणार नाही.

१५) म्हणजे त्याला कोण्या नोद ठेवणाऱ्यांची हिशेब ठेवणाऱ्याची आणि साक्षीदाराची आवश्यकता नाही. हे कर्मपत्र आणि साक्षीदार एक तर्क म्हणून आणि बहाणे रद्द करण्यासाठी म्हणून असतील.

وَسِيقَ الَّذِينَ كَفَرُوا إِلَىٰ جَهَنَّمَ زُمَرًا ۖ حَتَّىٰ إِذَا جَاءُوهَا
فُتِحَتْ أَبْوَابُهَا وَقَالَ لَهُمْ خَزَنَتُهَا أَلَمْ يَأْتِكُمْ رُسُلٌ
مِّنكُمْ يَتْلُونَ عَلَيْكُمْ آيَاتِ رَبِّكُمْ وَيُنذِرُونَكُمْ لِقَاءَ
يَوْمِكُمْ هَٰذَا ۚ قَالُوا بَلَىٰ وَلَٰكِنْ حَقَّتْ كَلِمَةُ الْعَذَابِ
عَلَى الْكَافِرِينَ ﴿٧١﴾

काफिरांच्या टोळ्याच्या टोळ्या नरकाग्नीकडे हांकून लावल्या जातील. [१] जेव्हां ते त्याच्याजवळ पोहचून जातील, त्याचे दरवाजे त्यांच्यासाठी उघडून दिले जातील. [२] आणि तेथले रखवालदार त्यांना विचारतील की, काय तुमच्याजवळ, तुमच्यातून पैगंबर आले नव्हते? जे तुमच्यावर तुमच्या पालनकर्त्याची महावाक्ये वाचित होते, आणि तुम्हास या दिवसाच्या भेटीपासून सावध करीत होते? ते उत्तर देतील की होय खरे आहे. [३] परंतु शिक्षेचा हुकूम काफिरांवर सिद्ध होऊन गेला. [४] (७१)

قِيلَ ادْخُلُوا أَبْوَابَ جَهَنَّمَ خَالِدِينَ فِيهَا ۖ فَبِئْسَ
مَثْوَى الْمُتَكَبِّرِينَ ﴿٧٢﴾

सांगितले जाईल की, आता नरकाग्नीच्या दरवाज्यात दाखल होऊन जा. जेथे नित्य राहणे आहे; तर शिरजोरांचे ठिकाण फारच वाईट आहे. (७२)

وَسِيقَ الَّذِينَ اتَّقَوْا رَبَّهُمْ إِلَى الْجَنَّةِ زُمَرًا ۖ حَتَّىٰ إِذَا
جَاءُوهَا وَفُتِحَتْ أَبْوَابُهَا وَقَالَ لَهُمْ خَزَنَتُهَا سَلَامٌ
عَلَيْكُمْ طِبْتُمْ فَادْخُلُوهَا خَالِدِينَ ﴿٧٣﴾

आणि जे लोक आपल्या पालनकर्त्याला भित होते, त्यांच्या टोळ्याच्या टोळ्या बनवून स्वर्गाकडे पाठवून दिल्या जातील. [५] येथपावेतो की, जेव्हा ते त्याच्यापर्यंत येऊन जातील, आणि दरवाजे उघडून दिले जातील. [६] आणि तेथले रखवालदार त्यांना म्हणतील तुमच्यावर सलाम असो! तुम्ही मजेत राहिलात. तुम्ही याच्यांत नेहमीसाठी दाखल होऊन जा. (७३)

وَقَالُوا الْحَمْدُ لِلَّهِ الَّذِي صَدَقَنَا وَعْدَهُ وَأَوْرَثَنَا
الْأَرْضَ نَتَبَوَّأُ مِنَ الْجَنَّةِ حَيْثُ نَشَاءُ ۖ فَنِعْمَ أَجْرُ
الْعَامِلِينَ ﴿٧٤﴾

ते म्हणतील अल्लाहचे आभार आहेत ज्याने आमच्याशी आपले वचन पूर्ण करून दिले. आणि आम्हास या भूमीचे वारस बनविले की स्वर्गांत जेथे इच्छू तेथे राहू तर (सु) कर्म करणाऱ्यांचा फारच चांगला मोबदला आहे. (७४)

وَتَرَى الْمَلَائِكَةَ حَافِّينَ مِنْ حَوْلِ الْعَرْشِ يُسَبِّحُونَ
بِحَمْدِ رَبِّهِمْ ۖ وَقُضِيَ بَيْنَهُم بِالْحَقِّ وَقِيلَ
الْحَمْدُ لِلَّهِ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿٧٥﴾

आणि तु देवदूतास अल्लाहच्या महासिंहासनाच्या अवतीभवती चक्राकार उभे आहेत. आपल्या पालनकर्त्याची स्तुती आणि पावित्र्य वर्णन करताना पाहशील. [७] आणि सर्वांत आपसात न्यायाचा निवाडा करण्यात येईल की, सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे. जो सकल जगाचा पालनकर्ता आहे. [८] (७५)

آياتها ٨٥ (٤٠) سُورَةُ الْمُؤْمِنِ مَكِّيَّةٌ (٦٠) ركوعاتها ٩

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

महावाक्ये ८५ — (४०) सू. मोमिन — रुकूअ ९

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

حم ﴿١﴾

हा मीम (१)

تَنزِيلُ الْكِتَابِ مِنَ اللَّهِ الْعَزِيزِ الْعَلِيمِ ﴿٢﴾

या पुस्तकाचे अवतीर्ण करणे, [९] त्या अल्लाहकडून आहे, जो परमसमर्थ आणि ज्ञानी [१०] आहे. (२)

غَافِرِ الذَّنبِ وَقَابِلِ التَّوْبِ شَدِيدِ الْعِقَابِ ذِي
الطَّوْلِ ۖ لَا إِلَٰهَ إِلَّا هُوَ ۖ إِلَيْهِ الْمَصِيرُ ﴿٣﴾

पापांचा क्षमाकर्ता आणि पश्चात्ताप स्वीकारणारा, [११] कडक शिक्षा देणारा, [१२] औदार्य आणि सामर्थ्यवाला, [१३] ज्याच्याशिवाय, अन्य कोणी उपास्य नाही, त्याच्याचकडे परत फिरून जाणे आहे. (३)

१) 'जुमर' 'जम्र' पासून काढलेले आहे, आवाजाच्या अर्थांत, प्रत्येक गट समूहात बोलणे चालणे आणि आवाज जरूर असतात. म्हणून हे समूह किंवा गटासाठी सुद्धा वापरले जाते. अर्थ हा आहे की, काफिरांना नरकाग्नीकडे गटागटाच्या स्वरूपात घेऊन जाण्यात येईल. एका गटामागे दुसरा गट. याशिवाय त्यांना मारून ढकलून जनावराच्या कळपांप्रमाणे हाकून नेण्यात येईल. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''त्यांना नरकाग्नीकडे सक्तीने ढकलून नेण्यात येईल'' (सू.तूर-१३)

२) म्हणजे यांच्या पोहचल्यानंतर लगेच, नरकाग्नीचे साती दरवाजे उघडून दिले जातील की, शिक्षा देण्यात विलंब लागू नये.

३) म्हणजे ज्याप्रमाणे जगात वादविवाद व तक्रार आणि झगडा करीत असत, तेथे सर्वकाही डोळ्यांच्या समोर येऊन

गेल्यानंतर, वादविवाद आणि भांडणाचे कारणच बाकी राहणार नाही. म्हणून मान्य केल्याशिवाय गत्यंतर राहणार नाही.
४) म्हणजे आम्ही पैगंबरांना खोटे ठरविले आणि त्यांना विरोध केला. त्या दुर्दैवामुळे ज्याला आम्ही पात्र होतो. जेव्हा की आम्ही सत्त्यापासून पळ काढून निरर्थक गोष्टींचा अंगिकार केला. या गोष्टीला सू.मुल्क ८ ते १० मध्ये जास्त खुलाशाने वर्णन करण्यात आले आहे.
५) ईमानवाले आणि ईशभयवाले यांना सुद्धा, गटागटांच्या स्वरूपांत स्वर्गाकडे घेऊन जाण्यांत येईल. पहिले ज्यांना सानिध्य प्राप्त आहे ते, नंतर पुण्यवान लोक, अशाप्रकारे दर्जा दर्जा प्रमाणे, प्रत्येक गट समान दर्जावाल्यांवर एकत्रित असेल. उदाहरणार्थ पैगंबर पैगंबरांबरोबर सत्यवादी शहीद, आपल्याच वर्गाच्या बरोबर, धर्मपंडीत आपल्या जवळच्या लोकाबरोबर म्हणजे प्रत्येक वैशिष्ट्यवाले, आपल्या वैशिष्ट्य किंवा त्यांच्या सारख्यांबरोबर असतील. (इब्ने कसीर)
६) हदीसमध्ये येते स्वर्गाला आठ दरवाजे आहेत. याच्यात एक 'रय्यान' आहे. ज्यांतून फक्त उपास ठेवणारे दाखल होतील. (स.बुखारी क्र.३२५७, स.मुस्लिम क्र.८०८) अशाचप्रकारे दुसऱ्या दरवाज्यांची पण नावे असतील. जसे बाबुस्सलात, बाबुल सदका, बाबुल जिहाद, वगैरे (स.बुखारी, स.मुस्लिम) प्रत्येक दरवाज्यांची रुंदी, चाळीस वर्षाच्या प्रवासाइतकी असेल. असे असून सुद्धा ते भरलेले असतील. (स.मुस्लिम) सर्वांत पहिले स्वर्गाचा दरवाजा ठोठाविणारे, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम असतील. (स.मुस्लिम) स्वर्गांत सर्वांत प्रथम जाणाऱ्या गटाचे चेहरे, पौर्णीमेच्या रात्रीच्या चंद्राप्रमाणे आणि दुसऱ्या गटाचे चेहरे, आकाशांत चमकणाऱ्या ताऱ्यांमधून सर्वात जास्त चमकणाऱ्या ताऱ्यांप्रमाणे चमकत असतील. स्वर्गांमध्ये ते मलमूत्र विसर्जनापासून आणि थुंक कफ यापासून पवित्र असतील. त्यांचे कंगवे सोन्याचे आणि घाम कस्तुरीयुक्त असेल. त्यांच्या अंगठ्यात सुवासिक लाकूड असेल. त्यांच्या पत्न्या मोठ्या डोळ्यांच्या अप्सरा असतील. त्यांची उंची आदम عليه السلام प्रमाणे साठ हात असेल. (स.बुखारी) स.बुखारीच्याच एका दुसऱ्या रिवायतीने ठाऊक होते की, प्रत्येक ईमानवाल्याला दोन पत्न्या मिळतील. त्यांच्या रुपसौंदर्याची अशी स्थिती असेल, की यांच्या पोटऱ्यांतील मगज मांसा आडून दिसत असेल. (किताब बदअल खलक, बाब माजाअ फी सिफ्तुल जन्ना) काहींनी म्हटले आहे, या दोन पत्न्या, अप्सरांशिवाय जगातील स्त्रियांपैकी असतील. परंतु कारण की, ७२ अप्सरांवाली रिवायत सनदेच्या दृष्टीने बरोबर नाही. म्हणून उघडरित्या हीच गोष्ट बरोबर वाटते की प्रत्येक स्वर्गवाश्याला कमीत कमी, अप्सरेसह दोन पत्न्या असतील. तथापि, ''व लहुम् फिहा मा यशतहून'' च्या अंतर्गत, जास्त पण शक्य आहेत. वल्लाह् अअ्लम! (आणखी पहावे फत्हुल बारी बाब मजकुर)
७) अल्लाहच्या हुकूमानंतर जेव्हा ईमानवाले स्वर्गात आणि कुफ्र आणि शिर्कवाले नरकाग्नीत चालले जातील, महावाक्यात याच्या नंतरचे चित्रण केले गेले आहे की, देवदूत अल्लाहच्या महासिंहासनाला घेरून अल्लाहच्या स्तुती आणि पावित्र्य वर्णनांत दंग असतील.
८) येथे स्तुतीचा संबंध, कोण्या एका सृष्टीकडे केला गेला नाही. ज्याने ठाऊक होते की, प्रत्येक वस्तू (बोलणारी किंवा न बोलणारी) च्या जिभेवर अल्लाहच्या स्तुतींचे गीत असतील. या अध्यायाला सू.गाफिर आणि सू.तौल पण म्हणतात.
९) किंवा तन्ज़ील 'मुनज्जल' च्या अर्थांत आहे. म्हणजे अल्लाहकडून अवतरीत झालेले, ज्यात असत्य नाही.
१०) जो परमसमर्थ आहे. त्याच्या शक्ती आणि वर्चस्वापुढे कोणाचे काहीच चालू शकत नाही. ज्ञाता आहे. त्याच्यापासून एक कण पण गुप्त नाही. मग तो कितीका घनदाट पडद्यांत लपलेला का असेना!
११) मागील पापांना, क्षमाकर्ता, आणि भविष्यात होणाऱ्या कोताईंवर पश्चात्ताप मान्यकर्ता किंवा आपल्या मित्रांसाठी क्षमाकर्ता आहे. आणि जर काफिर आणि मुशरिक पश्चात्ताप व्यक्त करतील. तर त्यांचा पश्चात्ताप मान्यकर्ता आहे.
१२) त्यांच्याकरीता जे परलोकांवर इहलोकाला प्राधान्य देतात, आणि शिरजोरी व मोठ्या अत्याचाराचा मार्ग अनुसरतील. हे अल्लाहच्या त्या म्हणण्याप्रमाणेच आहे, ''माझ्या सेवकांना सांगून द्या की मी क्षमाकर्ता आणि दयाळू आहे आणि माझी शिक्षापण फारच दु:खदायक आहे.'' (सू.हिज्र-४९-५०) कुरआन करीममध्ये बहुतेक ठिकाणी, ही दोन्ही वैशिष्टये बरोबर बरोबर वर्णन केली गेली आहेत की, मनुष्याने भय आणि आशेच्या दर्म्यान रहावे. कारण की, निव्वळ भीतीच भीती मनुष्याला अल्लाहच्या दया आणि क्षमेकडून निराश करू शकते. आणि निव्वळ आशा गुन्हा करण्यात धाडशी बनवून देते.
७) 'तव्‌ल' चा अर्थ संपन्नता आणि श्रीमंत आहे. म्हणजे तोच संपन्न आणि श्रीमंती प्रदान करणारा आहे. काही म्हणतात याचा अर्थ आहे, इनाम व भरपूर देणे. म्हणजे आपल्या सेवकांवर इनाम आणि उदारता करणारा आहे.

مَا يُجَادِلُ فِيٓ ءَايَٰتِ ٱللَّهِ إِلَّا ٱلَّذِينَ كَفَرُواْ فَلَا يَغۡرُرۡكَ
تَقَلُّبُهُمۡ فِي ٱلۡبِلَٰدِ ٤

**अल्लाहतआलाच्या निशाण्यांमध्ये तेच लोक झगडतात, जे काफिर आहेत. (१) तर त्या लोकांचे शहरात चालणे फिरणे, तुम्हास धोक्यात घालू नये. (२) ④**

كَذَّبَتۡ قَبۡلَهُمۡ قَوۡمُ نُوحٖ وَٱلۡأَحۡزَابُ مِنۢ بَعۡدِهِمۡۖ
وَهَمَّتۡ كُلُّ أُمَّةِۭ بِرَسُولِهِمۡ لِيَأۡخُذُوهُۖ وَجَٰدَلُواْ
بِٱلۡبَٰطِلِ لِيُدۡحِضُواْ بِهِ ٱلۡحَقَّ فَأَخَذۡتُهُمۡۖ فَكَيۡفَ
كَانَ عِقَابِ ٥

**नूहच्या लोकांनी आणि त्यांच्या नंतरच्या दुसऱ्या लोक समूहांनी पण खोटे ठरवले होते. आणि प्रत्येक उम्मतने आपल्या पैगंबराला गिरफ्तार करण्याचा इरादा केला.आणि असत्याच्या सहाय्याने वादविवाद घातला जेणेकरून सत्याला बिघडवून द्यावे. (३) तर मी त्यांना पकडून घेतले. (४) तर माझ्याकडून कशी शिक्षा झाली. (५) ⑤**

وَكَذَٰلِكَ حَقَّتۡ كَلِمَتُ رَبِّكَ عَلَى ٱلَّذِينَ كَفَرُوٓاْ أَنَّهُمۡ
أَصۡحَٰبُ ٱلنَّارِ ٦

**आणि अशाचप्रकारे तुमच्या पालनकर्त्याचा हुकूम काफिरांवर सिद्ध होऊन गेला. की ते नर्कवासी आहेत (६) ⑥**

ٱلَّذِينَ يَحۡمِلُونَ ٱلۡعَرۡشَ وَمَنۡ حَوۡلَهُۥ يُسَبِّحُونَ بِحَمۡدِ
رَبِّهِمۡ وَيُؤۡمِنُونَ بِهِۦ وَيَسۡتَغۡفِرُونَ لِلَّذِينَ ءَامَنُواْۖ رَبَّنَا
وَسِعۡتَ كُلَّ شَيۡءٖ رَّحۡمَةٗ وَعِلۡمٗا فَٱغۡفِرۡ لِلَّذِينَ تَابُواْ
وَٱتَّبَعُواْ سَبِيلَكَ وَقِهِمۡ عَذَابَ ٱلۡجَحِيمِ ٧

**महासिंहासनाला उचलणारे आणि त्याच्या आजुबाजूचे (देवदूत), आपल्या पालनकर्त्याचे पावित्र्य वर्णन स्तुतीच्या बरोबर बरोबर करीत असतात. आणि त्याच्यावर ईमान ठेवतात. आणि ईमानवाल्यांसाठी क्षमा याचना करीत असतात. म्हणतात हे आमच्या पालनकर्त्या! तू प्रत्येक वस्तुंला आपल्या दया आणि ज्ञानाने घेरून आहेस. तर तू त्यांना क्षमा करून टाक, जे पश्चात्ताप व्यक्त करतील, आणि तुझ्या मार्गाचे अनुकरण करतील; आणि तू त्यांना नरकाग्नीच्या शिक्षेपासून पण वाचवून घे (७) ⑦**

رَبَّنَا وَأَدۡخِلۡهُمۡ جَنَّٰتِ عَدۡنٍ ٱلَّتِي وَعَدتَّهُمۡ وَمَن
صَلَحَ مِنۡ ءَابَآئِهِمۡ وَأَزۡوَٰجِهِمۡ وَذُرِّيَّٰتِهِمۡۚ إِنَّكَ أَنتَ
ٱلۡعَزِيزُ ٱلۡحَكِيمُ ٨

**हे आमच्या पालनकर्त्या! तू त्यांना नित्य रहाणाऱ्या स्वर्गांच्या बागात घेऊन जा, ज्यांचे तू त्यांना वचन दिले आहेस. आणि त्यांचे वाडवडील आणि पत्न्या आणि संततीमधून (सुद्धा), (जी) सुकृत्ये करणारी आहेत. (८) नि:संशय तू सामर्थ्यवान आणि बुद्धीवान आहेस ⑧**

وَقِهِمُ ٱلسَّيِّـَٔاتِۚ وَمَن تَقِ ٱلسَّيِّـَٔاتِ يَوۡمَئِذٖ فَقَدۡ رَحِمۡتَهُۥۚ
وَذَٰلِكَ هُوَ ٱلۡفَوۡزُ ٱلۡعَظِيمُ ٩

**त्यांना कुकृत्यापासून पण सुरक्षित ठेव. (९) सत्त्य तर हे आहे की, त्या दिवशी तू ज्याला वाईटांपासून वांचवून घेतले, त्यावर तू मेहेरबानी केलीस. आणि सगळ्यांत मोठे साफल्य तर हेच आहे (१०) ⑨**

إِنَّ ٱلَّذِينَ كَفَرُواْ يُنَادَوۡنَ لَمَقۡتُ ٱللَّهِ أَكۡبَرُ مِن مَّقۡتِكُمۡ
أَنفُسَكُمۡ إِذۡ تُدۡعَوۡنَ إِلَى ٱلۡإِيمَٰنِ فَتَكۡفُرُونَ ١٠

**नि:संशय ज्या लोकांनी कुफ्र केले, त्यांना हा आवाज दिला जाईल की, खचित्च अल्लाहचे तुमच्याशी बेजार होणे, यापेक्षाजास्त आहे, जे तुम्ही बेजार होत होता, आपल्या जिवाकडून, जेव्हा तुम्ही ईमानाकडे बोलाविले जात होता. मग कुफ्र करू लागत असत (११) ⑩**

१) या झगड्याने अभिप्रेत, अयोग्य आणि निरर्थक झगडा (भांडण) ज्याचा उद्देश्य सत्त्याला खोटे ठरविणे आणि त्याचे रद्द करणे आहे. नाहीतर ज्या भांडणाचा (वादविवादाचा) उद्देश्य सत्त्याला प्रकट करणे, असत्त्याचे खंडन आणि नाकारणाऱ्यांचे आणि आक्षेप घेणाऱ्यांच्या शंकाचे निर्सन करणे असेल. ते निंदास्पद नाही. फारच प्रसंशनीय आणि चांगले आहे. ज्ञानी लोकांना तर याची ताकीद केली गेली आहे. ''तुम्ही त्याला लोकांच्या समोर अवश्य वर्णन करा, त्याला लपवू नका.'' (सू.आले इमरान - १८७) किंबहुना अल्लाहने अवतरीत केलेल्या पुस्तकाची प्रमाणे आणि पुरावे, यांना लपविणे, एवढा मोठा अपराध आहे की, याच्यावर ब्रम्हांडांची प्रत्येक वस्तूशाप देते. (सू.बकर : १५९)

२) म्हणजे हे काफिर आणि मुशरिक जो व्यापार करतात, त्यासाठी वेगवेगळ्या शहरांत येतात, जातात. आणि भरपूर नफा मिळवितात. हे आपल्या कुफ्रच्या कारणाने लवकरच अल्लाहच्या पकडीत येऊन लागतील. हे अवकाश अवश्य दिले जात आहे. परंतु त्यांना असेच सोडून देण्यात येणार नाही.

३) यासाठी की त्याला कैद करावी किंवा ठार मारावे किंवा शिक्षा द्यावी.

४) म्हणजे त्यांनी आपल्या पैगंबरांशी वितंडवाद केला; ज्याच्याने त्यांचा उद्देश्य सत्त्याला डांवलणे, आणि त्याला दुर्बल करणे हा होता.
५) म्हणून मी त्या मिथ्यावादींना आपल्या शिक्षेत पकडीत धरून घेतले. तर तुम्ही पाहून घ्या की, त्यांच्या बाबतीत माझी शिक्षा कशा प्रकारे आली. आणि त्यांना कशाप्रकारे चुकीच्या अक्षराप्रमाणे पुसून टाकले. किंवा त्यांना बोध घेण्यासारखे करून टाकले.
६) याच्याने उद्देश्य त्या गोष्टीला जाहीर करणे आहे की, ज्याप्रमाणे मागील लोकसमूहांवर तुझ्या पालनकर्त्याची शिक्षा सिद्ध झाली आणि त्या नष्ट करून टाकल्या गेल्यात; जर हे मक्केवाले सुद्धा तुला खोटे ठरवतील आणि तुझ्या विरोधापासून परावृत्त होणार नाहीं, आणि निरर्थक वितंडवादाला सोडले नाही, तर हे सुद्धा अल्लाहच्या शिक्षेच्या पकडीत येऊन जातील. मग त्यांना कोणी वांचवू शकणार नाही.
७) याच्यात अल्लाहच्या सानिध्य पावलेल्या देवदूतांच्या खास पथकाची चर्चा आणि ते जे काही करीत आहेत, त्याचा खुलासा आहे. हा गट त्या देवदूतांचा आहे ज्यांनी महासिंहासनाला उचलून धरले आहे आणि जे ते महासिंहासनाच्या चौफेर आहेत. त्यांचे एक काम हे आहे की, हे अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्तुती करतात. म्हणजे दोषांपासून पाकसाफ. त्यांच्यात असलेल्या कमाली व खुब्या या सिद्ध करणे आणि त्याच्या समोर विनयशिलता आणि स्वत:ला कमी लेखणे, म्हणजे ईमानाचे जाहीर करणे आहे. दुसरे काम त्यांचे हे आहे की ईमानवाल्यांसाठी क्षमायाचना करणे. असे म्हणतात की, महासिंहासनाला उचलणारे देवदूत चार आहेत. परंतु कयामतच्या दिवशी त्यांची संख्या आठ होईल. (इब्ने कसीर)
८) म्हणजे त्या सर्वांना स्वर्गांत एकत्र गोळा करून दे. कारण की एक दुसऱ्यांना पाहून त्यांचे डोळे गार व्हावेत. या विषयाला दुसऱ्या ठिकाणी अशाप्रकारे सांगण्यात आले आहे, ''ते लोक ज्यांनी ईमान आणले, आणि त्यांचे अनुकरण केले ईमानासह त्यांच्या संततीने, आम्ही त्यांना आपल्या संततीला भेटवून दिले; आणि आम्ही त्यांच्या कर्मांमध्ये काहीही कमी केले नाही.'' (सू.तूर-२१) म्हणजे सर्वांना स्वर्गामध्ये असा समान मर्तबा देऊन दिला की, कमी दर्जावाल्याला सुद्धा, उच्च स्थान देऊन टाकले. असे म्हटले नाही की, उच्च स्थानांत कमी करून त्यांना कनिष्ठ स्थानांवर घेऊन आले. किंबहुना कनिष्ठाला उचलून उच्च करून टाकले आणि त्याच्या कर्मांच्या कमतरतेला आपल्या कृपा आणि औदार्याने पूर्ण करून टाकले.
९) 'सय्यिआत' ने अभिप्रेत येथे वाईट गोष्टी आहेत. किंवा मग मोबदला महजुफ आहे. म्हणजे त्यांना परलोकातील शिक्षांपासून किंवा वाईटांच्या मोबदल्या पासून वाचविणे.
१०) म्हणजे परलोकातील शिक्षांपासून वांचून जाणे आणि स्वर्गांत दाखल होऊन जाणे. हेच सर्वांत मोठे यश आहे. यासाठी की, यासारखे कोणतेच यश नाही. आणि याच्याबरोबर कोणतीच मुक्ती नाही. या महावाक्यांमध्ये ईमानवाल्यांसाठी दोन मोठ्या खुषखबरी आहेत. एक तर ही की, देवदूत त्यांच्यासाठी अदृष्यावस्थेत दुआ करतात. (ज्यांचे हदीसमध्ये मोठे महात्म्य आलेले आहे.) दुसरे हे की, ईमानवाल्यांचे कुटुंबीय, स्वर्गांत एकत्र होऊन जातील. जअलनल्लाहु मिन्ल् लजीना युलहिकुमुल्लाह् बि आबाई हिमुस् सॉलेहिन.
११) 'मक्तुन' फारच नाराजीला म्हणतात. कुफ्रवाले जे आपल्याला नरकाग्नीच्या आगीत होरपळतांना पाहतील, तेव्हाआपल्यावर फारच नाराज होतील. त्यावेळी त्यांना सांगण्यात येईल की, जगात तुम्हाला जेव्हा ईमानाचे आमंत्रण देण्यात येत असे, आणि तुम्ही त्याला नाकारत होता, तेव्हा अल्लाहतआला त्यापेक्षा जास्त तुमच्यावर नाराज होत असे, जेवढे तुम्ही आज आपल्या स्वत:वर (नाराज) होत आहात. हा अल्लाहच्या त्या नाराजीचाच परिणाम आहे की, आज तुम्ही नरकाग्नीत आहात.

قَالُوْا رَبَّنَآ اَمَتَّنَا اثْنَتَيْنِ وَاَحْيَيْتَنَا اثْنَتَيْنِ فَاعْتَرَفْنَا بِذُنُوْبِنَا فَهَلْ اِلٰى خُرُوْجٍ مِّنْ سَبِيْلٍ ﴿١١﴾

**ते म्हणतील हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हास दोनदा मारलेस, आणि दोनदांच, जिवंत केलेस.** [१] **आताआम्ही आपल्या गुन्ह्यांना मान्य करीत आहोत.** [२] **तर काय आता (याच्यातून) निघण्याचा काही मार्ग पण आहे?** [३] **(११)**

ذٰلِكُمْ بِاَنَّهٗٓ اِذَا دُعِيَ اللّٰهُ وَحْدَهٗ كَفَرْتُمْ ۚ وَاِنْ يُّشْرَكْ بِهٖ تُؤْمِنُوْا ۭ فَالْحُكْمُ لِلّٰهِ الْعَلِيِّ الْكَبِيْرِ ﴿١٢﴾

**ही (शिक्षा) तुम्हास यासाठी आहे की, जेव्हा फक्त एका अल्लाहचा उल्लेख केला जात असे तर तुम्ही नाकारून टाकत होता. आणि जर त्याच्या बरोबर कोणाला शामील केले जात असे, तर तुम्ही मान्य करून घेत होता.** [४] **तर आज अल्लाहचाच हुकूम आहे, जो महिमाशाली आणि मोठा आहे.** [५] **(१२)**

هُوَ الَّذِيْ يُرِيْكُمْ اٰيٰتِهٖ وَيُنَزِّلُ لَكُمْ مِّنَ السَّمَاۗءِ رِزْقًا ۭ وَمَا يَتَذَكَّرُ اِلَّا مَنْ يُّنِيْبُ ﴿١٣﴾

**तोच आहे, जो तुम्हास आपल्या निशाण्या दाखवतो आणि तुमच्या करीता आकाशांतून अन्नसंपत्ती उतारतो.** [६] **बोध तर फक्त तेच घेतात, जे (अल्लाहकडे) वळतात** [७] **(१३)**

فَادْعُوا اللّٰهَ مُخْلِصِيْنَ لَهُ الدِّيْنَ وَلَوْ كَرِهَ الْكٰفِرُوْنَ ﴿١٤﴾

**तुम्ही अल्लाहला बोलावित रहा, त्याच्याकरता धर्मपालन शुद्ध करून, मग काफिरांना किती का वाईट वाटेना!** [८] **(१४)**

१) बहुतेक भाष्यकारांच्या भाष्याप्रमाणे दोन मृत्यूपैकी पहिला मृत्यू तर तो विर्यबिंदु आहे, जो बापाच्या पाठीत असतो म्हणजे त्याच्या अस्तित्वाच्या (होय) पहिले त्याच्या नसण्याला (नाही) मृत्यू संबोधित केले गेले आहे. आणि दुसरा मृत्यू तो आहे, ज्याला मनुष्य आपले जीवन घालवून जाऊन भेटतो. आणि त्याच्या नंतर कबरीत दफन होतो. आणि दोन जीवनांमधून पहिले जीवन हे ऐहिक जीवन आहे, ज्याची सुरवात जन्मापासून आणि संपणे मृत्युनेच होते. आणि दुसरे जीवन ते आहे, जे कयामतच्या दिवशी कबरींमधून उठल्यानंतर, प्राप्त होईल. याच दोन मृत्यू आणि दोन जीवनाची चर्चा, ''वास्तविक तुम्ही मृत होता, त्याने तुम्हास जिवंत केले; मग तुम्हांस मारून टाकील, मग पुन्हा जिवंत करून टाकील.'' (सू.बकर : - २८) मध्ये सुद्धा केली गेली आहे.

२) म्हणजे नरकाग्नीत गेल्यानंतर मान्य करतील. जेथे मान्य करण्याचा काही फायदा नाही आणि जेथे पश्चात्ताप पावतील, तेथे पश्चात्ताप व्यक्त करण्याची काही किंमत नाही.

३) ही तीच इच्छा आहे, ज्याची चर्चा कुरआन मजीदमध्ये अनेक ठिकाणी केली गेली आहे. की आम्हास दुसऱ्यादा जगात पाठवून देण्यांत यावे. कारण की, आम्ही पुण्य कमवून आणावे.

४) हे त्यांच्या नरकाग्नीतून न निघण्याचे कारण सांगितले की, तुम्ही जगात, अल्लाहच्या एकेश्वरवादाला मानणारे नव्हते. आणि शिर्क तुम्हाला फारच प्रिय होते. म्हणून नरकाग्नीच्या नित्याच्या शिक्षेशिवाय, तुमच्यासाठी काहीही नाही.

५) हा एका अल्लाहचा हुकूम आहे की, आता तुमच्यासाठी नरकाग्नीची शिक्षा कायमची आहे. आणि याच्यातूंन निघण्याचा काही मार्ग नाही. जो 'अलिय्युन' म्हणजे या गोष्टींपासून थोर आहे की, त्याच्या व्यक्तीत्वांत किंवा वैशिष्ट्यात कोणी त्याच्या सारखा असावा. आणि 'कबीर' म्हणजे त्या गोष्टींपासून फार मोठा आहे की त्याच्या सारखा कोणी असावा; किंवा पत्नी आणि संतान असावे; किंवा त्याचा कोणी भागीदार असावा.

६) म्हणजे पाणी जे तुमच्याकरीता तुमच्या अन्नसंपत्तीला कारणीभूत आहे. येथे अल्लाहतआलाने निशाण्यांच्या जाहीर करण्याला अन्नसंपत्ती अवतीर्ण करण्याबरोबर गोळा करून दिले. याकरीता की अल्लाहच्या सामर्थ्याच्या निशाण्यांना जाहीर करणे, धर्मांचा आधार आहे. आणि अन्नसंपत्ती, शरीरांचा आधार आहे. अशाप्रकारे येथे दोन्ही आधारांना एकत्रित करून देण्यात आले आहे. (फत्हुल कदीर)

७) अल्लाहच्या आज्ञापालनाकडे ज्यामुळे त्यांच्या मनांत परलोकाचे भय निर्माण होते. आणि अल्लाहचे आदेश व कर्तव्यांचे नियमित पालन करतात.

८) म्हणजे जेव्हा सर्व काही अल्लाहच एकटा करणारा आहे, तर काफिरांना मग किती का वाईट वाटेना, फक्त त्याच एका अल्लाहचा धावा करा, त्याच्याचसाठी उपासना आणि आज्ञापालनाला निर्मळ करून.

رَفِيْعُ الدَّرَجٰتِ ذُو الْعَرْشِ ۚ يُلْقِى الرُّوْحَ مِنْ اَمْرِهٖ عَلٰى مَنْ يَّشَآءُ مِنْ عِبَادِهٖ لِيُنْذِرَ يَوْمَ التَّلَاقِ ﴿١٥﴾

**दर्जात उच्च महासिंहासनाचा स्वामी, तो आपल्या सेवकांमधून ज्यावर इच्छितो, 'वह्य' अवतरीत करतो. [१] कारण की त्याने मुलाखतीच्या दिवसापासून भिववावे (१५)**

يَوْمَ هُمْ بٰرِزُوْنَ ۚ لَا يَخْفٰى عَلَى اللّٰهِ مِنْهُمْ شَيْءٌ ؕ لِمَنِ الْمُلْكُ الْيَوْمَ ؕ لِلّٰهِ الْوَاحِدِ الْقَهَّارِ ﴿١٦﴾

**ज्या दिवशी सर्व लोक हजर केले जातील, [२] त्यांच्यातून कोणीही अल्लाहकडून गुप्त राहणार नाही. आज कोणाचे राज्य आहे? [३] फक्त एकट्या व जबरदस्त अल्लाहचे! [४] (१६)**

اَلْيَوْمَ تُجْزٰى كُلُّ نَفْسٍۭ بِمَا كَسَبَتْ ؕ لَا ظُلْمَ الْيَوْمَ ؕ اِنَّ اللّٰهَ سَرِيْعُ الْحِسَابِ ﴿١٧﴾

**आज प्रत्येक जीवाला त्याचे करणीचे फळ दिले जाईल. आज कुठल्याही प्रकारचा जुलूम नाही. नि:संशय अल्लाहतआला फारच जलद् हिशेब करणारा आहे. [५] (१७)**

وَاَنْذِرْهُمْ يَوْمَ الْاٰزِفَةِ اِذِ الْقُلُوْبُ لَدَى الْحَنَاجِرِ كٰظِمِيْنَ ۬ؕ مَا لِلظّٰلِمِيْنَ مِنْ حَمِيْمٍ وَّلَا شَفِيْعٍ يُّطَاعُ ؕ﴿١٨﴾

**आणि त्यांना फारच जवळ [६] येणाऱ्या (कयामतने) सावध करून द्या. जेव्हाकी काळीजे घशापर्यंत पोहचून जातील. आणि सर्व स्तब्ध असतील. [७] जालीमांचा न कोणी मित्र असेल न शिफारसकर्ता की ज्याची गोष्ट, मानली जाईल (१८)**

يَعْلَمُ خَآئِنَةَ الْاَعْيُنِ وَمَا تُخْفِى الصُّدُوْرُ ﴿١٩﴾

**जो डोळ्यांच्या चोरीला, आणि उरांच्या गुप्त गोष्टीला (खूप) चांगल्या प्रकारे जाणतो. [८] (१९)**

१) 'रूह' ने अभिप्रेत 'वह्य' आहे. जे सेवकांमधूनच कोणाला निवडून त्यावर अवतीर्ण करतो. 'वह्याला' रूह यासाठी म्हटले की, ज्याप्रमाणे आत्म्यात मानवी जीवनाचे बाकी राहणे आणि सुरक्षित रहाण्याचे रहस्य लपलेले आहे. अशाचप्रकारे वह्याने सुद्धा, त्या मानवी अंत:करणांत, जीवनाची लहर उसळते. जे पहिल्या कुफ्र आणि शिर्क मुळे मृत असतात.

२) म्हणजे जिवंत होऊन कबरींतून निघून पडतील.

३) हे कयामतच्या दिवशी अल्लाहतआला विचारील, जेव्हा सर्व मनुष्ये त्याच्यासमोर हशरच्या मैदानांत जमा होतील. ''अल्लाहतआला पृथ्वीला आपल्या मुठीत आणि आकाशाला आपल्या उजव्या हातांत गुंडाळून घेईल आणि म्हणेल मी बादशाह आहे. पृथ्वीचे बादशाह कोठे आहेत?'' (स. बूखारी सू. जुमर)

४) जेव्हा कोणी काही बोलणार नाही. तर हे उत्तर अल्लाहतआला स्वत:च देईल. काही म्हणतात की, अल्लाहतआलाच्या हुकूमाने एक देवदूत दवंडी देईल. ज्याच्या बरोबरच सर्व काफिर व मुसलमान एका आवाजाने हेच उत्तर देतील. (फत्हुल कदीर)

५) यासाठी की त्याला, सेवकांप्रमाणे चिंतन आणि मनन करण्याची आवश्यकता पडणार नाही.

६) 'आजिफतून' चा अर्थ आहे जवळ येणारी. हे कयामतचे एक नांव आहे. यासाठी की ती पण जवळ येणारी आहे.

७) म्हणजे त्या दिवशी भीतीमुळे अंत:करणे आपल्या जागेवरून हलून जातील. 'काजिमीन', दु:खाने ओतप्रोत किंवा रडत रडत, किंवा स्तब्ध, याचे तिन्ही अर्थ केले गेले आहेत.

८) याच्यात अल्लाहतआलाच्या परिपूर्ण ज्ञानाचे वर्णन आहे की त्याला सर्व वस्तुंचे ज्ञान आहे. मग ती लहान असो की मोठी, बारिक असो किंवा जाडी, उच्च दर्जाची असो किंवा कनिष्ट दर्जाची; म्हणून मनुष्यास पाहिजे की जेव्हा त्याच्या परिपूर्ण ज्ञानाची ही स्थिती आहे, तर त्याच्या आज्ञाभंजनापासून बचाव, आणि खऱ्या अर्थाने त्याचे भय आपल्यात निर्माण करून घ्यावे. डोळ्यांची चोरी ही आहे की, डोळ्यांच्या कोपऱ्यातून पाहिले जावे. जसे रस्त्याने जाणाऱ्या सुंदर स्त्रीला तिरप्या नजरेने पाहिले जावे. उरांतील गोष्टींमध्ये, त्या मनांत ध्वनीत होणाऱ्या भ्रामक कल्पना पण येतात, ज्या माणसांच्या मनात निर्माण होत असतात. ते तोपर्यंत वसवसे (भ्रामक कल्पना) च असतात. म्हणजे एक क्षणभर येतात आणि जातात, आणि संपून जातात. तोपर्यंत तर त्यांच्यावर पकड होणार नाही. परंतु जेव्हा ते इराद्यांचे रुप धारण करून घेतील, तर त्यावर पकड होऊ शकेल. मग जरी त्यावर अंमलबजावणी करण्याची त्याला संधी मिळाली नसेल. (आणखी पहावे सू. बकरा: महावाक्य-२८४ चा समास)

وَاللّٰهُ يَقۡضِىۡ بِالۡحَقِّ ؕ وَالَّذِيۡنَ يَدۡعُوۡنَ مِنۡ دُوۡنِهٖ لَا يَقۡضُوۡنَ بِشَىۡءٍ ؕ اِنَّ اللّٰهَ هُوَ السَّمِيۡعُ الۡبَصِيۡرُ ﴿۲۰﴾

आणि अल्लाहतआला ठिक ठिक फैसला करून टाकीन. त्याच्याशिवाय ज्यांना हे लोक बोलावितात, ते कोणत्याही गोष्टीचा फैसला करू शकत नाही. (१) नि:संशय अल्लाहतआला ऐकतो व पाहतो आहे. (२०)

اَوَلَمۡ يَسِيۡرُوۡا فِى الۡاَرۡضِ فَيَنۡظُرُوۡا كَيۡفَ كَانَ عَاقِبَةُ الَّذِيۡنَ كَانُوۡا مِنۡ قَبۡلِهِمۡ ؕ كَانُوۡا هُمۡ اَشَدَّ مِنۡهُمۡ قُوَّةً وَّ اٰثَارًا فِى الۡاَرۡضِ فَاَخَذَهُمُ اللّٰهُ بِذُنُوۡبِهِمۡ ؕ وَمَا كَانَ لَهُمۡ مِّنَ اللّٰهِ مِنۡ وَّاقٍ ﴿۲۱﴾

काय हे लोक जमिनीवर चालत फिरत नाहीत की पहाते की, जे लोक यांच्यापूर्वी होते, त्यांचा परिणाम कसा काय झाला? ते शक्ती आणि सामर्थ्याच्या अनुषंगाने आणि पृथ्वीत त्यांनी मागे सोडलेल्या आपल्या स्मृतींच्या अनुषंगाने यांच्या पेक्षा फारच जबरदस्त होते. तेव्हाअल्लाहने त्यांना त्यांच्या गुन्ह्यांवर पकडून घेतले. आणि कोणीच त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वाचवू शकला नाही. (२) (२१)

ذٰلِكَ بِاَنَّهُمۡ كَانَتۡ تَّاۡتِيۡهِمۡ رُسُلُهُمۡ بِالۡبَيِّنٰتِ فَكَفَرُوۡا فَاَخَذَهُمُ اللّٰهُ ؕ اِنَّهٗ قَوِىٌّ شَدِيۡدُ الۡعِقَابِ ﴿۲۲﴾

हे यासाठी की, यांच्याजवळ यांचे पैगंबर चमत्कार घेऊन येत असत, तेव्हा ते इन्कार करून टाकीत असत. (३) तर अल्लाह त्यांना पकडून घेत असे. नि:संशय तो फारच बलाढ्य आणि कडक शिक्षा देणारा आहे. (२२)

وَلَقَدۡ اَرۡسَلۡنَا مُوۡسٰى بِاٰيٰتِنَا وَسُلۡطٰنٍ مُّبِيۡنٍ ﴿۲۳﴾

आणि मूसाला आम्ही आपल्या निशाण्या व स्पष्ट प्रमाणासह पाठविले (४) (२३)

اِلٰى فِرۡعَوۡنَ وَهَامٰنَ وَقَارُوۡنَ فَقَالُوۡا سٰحِرٌ كَذَّابٌ ﴿۲۴﴾

फिरऔन हामान आणि कारूनकडे तेव्हा ते म्हणाले, (हा तर) जादूगार आहे. आणि लबाड आहे. (५) (२४)

१) यासाठी की, त्याला कुठल्याही गोष्टीचे ज्ञान नाही, तसेच न कोणावर काही सामर्थ्य आहे. त्यांना काही ठाऊक पण नाही आणि त्यांना कुठलाही अधिकार नाही. जेव्हांकी, निर्णयासाठी ज्ञान आणि अधिकार दोन्ही गोष्टींची आवश्यकता असते. आणि ही दोन्ही वैशिष्टये फक्त अल्लाहजवळच आहेत. म्हणूनच त्याला याचा हक्क आहे की, त्याने फैसला करावा आणि तो खचित्‌च सत्य सत्य फैसला करील; कारण की त्याला कोणाचे भय असणार नाही आणि कोणाची पर्वा आणि लोभ असणार नाही.

२) मागील महावाक्यांमध्ये परलोकाच्या अहवालाचे वर्णन होते. आता इहलोकाच्या अहवालाने त्यांना भिवविण्यांत येत आहे. की, लोकांनी जमिनीवर चालून फिरून, त्या लोकांचा परिणाम पहावा, जे याच्यापूर्वी याच खोटे ठरवण्याच्या अपराधांत नष्ट केले गेले, जी गोष्ट हे पण करीत आहे. वास्तविक पहाता, पूर्वीचे जनसमूह शक्ती सामर्थ्यात आणि साधन सामुग्रीत यांच्यापेक्षा कितीतरी जास्त होते. परंतु जेव्हा त्यांच्यावर अल्लाहची शिक्षा आली, तेव्हां त्यांना कोणी वाचवूशकले नाही. अशाच प्रकारे तुमच्यावर पण शिक्षा येऊ शकते. आणि जर ती येऊन लागली तर, तुमचा कोणी पाठीराखा होणार नाही.

३) हे त्यांच्या नष्ट होण्याचे कारण सांगण्यात येत आहे. आणि ते आहे अल्लाहच्या निशाण्यांना नाकारणे, आणि पैगंबरांना खोटे ठरवणे. आता पैगंबरीचा क्रम तर बंद झाला, तथापि या जगांत आणि स्वत: माणसांच्या आपल्या जिवात, अल्लाहच्या बेसुमार निशाण्या विखुरलेल्या आणि पसरलेल्या आहेत. याशिवाय प्रवचन व चर्चा, आणि (धर्माचा) प्रचार आणि प्रसार, यांच्या मार्फत धर्मपंडीत आणि सत्यवादी त्यांचा खुलासा आणि त्यांच्याकडे अंगुली निर्देश करण्याकरता उपस्थित आहेत. म्हणून आज सुद्धा, जो अल्लाहच्या निशाण्यांकडून जो बेपर्वा, आणि धर्म आणि धर्मशास्त्राकडे दुर्लक्ष करेल, त्याचा परिणाम पैगंबरांना खोटे ठरवणे आणि त्यांना नाकारण्याच्यापेक्षा वेगळा होणार नाही.

४) निशाण्यांनी अभिप्रेत त्या नऊ निशाण्यापण होऊ शकतात, ज्यांचा उल्लेख पूर्वी येऊन गेला आहे. किंवा लाठी आणि शुभ्र चकचकीत हात, हे दोन मोठे आणि स्पष्ट चमत्कार सुद्धा. 'सुलताने मुबीन' ने अभिप्रेत मजबुत प्रमाण, आणि स्पष्ट तर्क, ज्याचे कोणी उत्तर, त्यांच्याकडून शक्य नव्हते, शिवाय शिरजोरी आणि निर्लज्जपणाच्या.

५) फिरऔन इजिप्तमध्ये वसलेल्या किब्ती लोकांचा बादशाह होता. मोठा जुल्मी आणि क्रुर सर्वश्रेष्ठ पालनकर्ता होण्याचा दावेदार, त्याने ह.मूसा عليه السلام चे लोक बनी इस्राईलला दास बनवून ठेवले होते. आणि त्यांच्यावर नाना प्रकारचे अत्याचार करीत असे. जसे की कुरआनात वेगवेगळ्या ठिकाणी याचा तपशील आहे. हामान, फिरऔनाचा मंत्री आणि खास सल्लागार होता. कारून, आपल्या काळांतील सर्वांत मोठा श्रीमंत मनुष्य होता. या सर्वांनी पहिल्या लोकांप्रमाणे ह.मूसा عليه السلام ला खोटे ठरवले आणि त्यांना जादूगार आणि लबाड म्हटले. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''अशाच प्रकारे जे लोक याच्यापूर्वी होऊन गेलेत, त्यांच्याजवळ जो पण पैगंबर आला, त्यांनी सांगून टाकले की, एक तर हा जादूगीर आहे किंवा वेडा आहे. काय हे या गोष्टीची एकमेकांस ताकीद करीत आले आहेत? किंबहुना हे सर्वच्या सर्व शिरजोर आहेत'' (सू.जारियात - ५२/५३)

فَلَمَّا جَآءَهُم بِالْحَقِّ مِنْ عِندِنَا قَالُوا اقْتُلُوٓا أَبْنَآءَ
الَّذِينَ ءَامَنُوا مَعَهُۥ وَاسْتَحْيُوا نِسَآءَهُمْ ۚ وَمَا كَيْدُ
الْكَٰفِرِينَ إِلَّا فِى ضَلَٰلٍ ﴿٢٥﴾

जेव्हा त्यांच्या जवळ (मूसा) आमच्याकडून सत्य (धर्म) घेऊन आले, तेव्हा ते म्हणाले की, याच्याबरोबर जे ईमानवाले आहेत, त्यांच्या मुलांना तर ठार मारा आणि त्यांच्या मुलींना जिवंत राखा, [१] आणि काफिरांच्या ज्या युक्त्या आहेत. त्या चुकीतच आहेत[२] (२५)

وَقَالَ فِرْعَوْنُ ذَرُونِىٓ أَقْتُلْ مُوسَىٰ وَلْيَدْعُ رَبَّهُۥٓ ۖ
إِنِّىٓ أَخَافُ أَن يُبَدِّلَ دِينَكُمْ أَوْ أَن يُظْهِرَ فِى الْأَرْضِ
الْفَسَادَ ﴿٢٦﴾

आणि फिरऔन म्हणाला, मला सोडून द्या की मी मूसाला मारून टाकावे; आणि [३] त्याला पाहिजे की त्याने आपल्या पालनकर्त्यास बोलवावे. [४] मला तर अंदेशा वाटतो की, त्याने कोठे तुमचा धर्म बदलून न टाकावा; किंवा देशात (फार मोठा) फिसाद घडवून न आणावा[५] (२६)

وَقَالَ مُوسَىٰٓ إِنِّى عُذْتُ بِرَبِّى وَرَبِّكُم مِّن كُلِّ مُتَكَبِّرٍ
لَّا يُؤْمِنُ بِيَوْمِ الْحِسَابِ ﴿٢٧﴾

मूसाने म्हटले मी माझ्या आणि तुमच्या पालनकर्त्याचा आश्रय मागतो, प्रत्येक त्या गर्व करणाऱ्या माणसा (च्या कुकृत्या) पासून जो हिशोबाच्या दिवसावर ईमान आणित नाही. [६] (२७)

وَقَالَ رَجُلٌ مُّؤْمِنٌ مِّنْ ءَالِ فِرْعَوْنَ يَكْتُمُ إِيمَٰنَهُۥٓ
أَتَقْتُلُونَ رَجُلًا أَن يَقُولَ رَبِّىَ اللَّهُ وَقَدْ جَآءَكُم
بِالْبَيِّنَٰتِ مِن رَّبِّكُمْ ۖ وَإِن يَكُ كَٰذِبًا فَعَلَيْهِ كَذِبُهُۥ ۖ
وَإِن يَكُ صَادِقًا يُصِبْكُم بَعْضُ الَّذِى يَعِدُكُمْ ۖ إِنَّ
اللَّهَ لَا يَهْدِى مَنْ هُوَ مُسْرِفٌ كَذَّابٌ ﴿٢٨﴾

आणि एका ईमानवाल्या माणसाने जो फिरऔनाच्या कुटुंबियांपैकी होता, आणि आपले ईमान लपवून होता म्हटले की काय तुम्ही एका मनुष्याला केवळ या गोष्टींवर ठार मारतात की तो म्हणतो आहे माझा पालनकर्ता अल्लाह आहे, आणि तुमच्या पालनकर्त्याकडून प्रमाण घेऊन आला आहे. [७] जर तो लबाड असेल तर त्याची लबाडी त्याच्यावरच आहे. आणि जर तो खरा असेल तर, ज्या (शिक्षांचा) तो तुमच्याशी वायदा करीत आहे, ती कोणी न कोणी तुमच्यावर येऊन पडेल. [८] अल्लाहतआला, त्यांना मार्ग दाखवीत नाही, जे मर्यादेच्या बाहेर जाणारे आणि लबाड असतील. [९] (२८)

يَٰقَوْمِ لَكُمُ الْمُلْكُ الْيَوْمَ ظَٰهِرِينَ فِى الْأَرْضِ فَمَن
يَنصُرُنَا مِنۢ بَأْسِ اللَّهِ إِن جَآءَنَا ۚ قَالَ فِرْعَوْنُ
مَآ أُرِيكُمْ إِلَّا مَآ أَرَىٰ وَمَآ أَهْدِيكُمْ إِلَّا سَبِيلَ الرَّشَادِ ﴿٢٩﴾

हे माझ्या समाजबंधुंनो! आज तर राज्य तुमचेच आहे. की या भूतलावर तुम्ही प्रबळ [१०] आहात; परंतु जर अल्लाहची शिक्षाआमच्यावर येऊन लागली, तर कोण आमची मदत करील? [११] फिरऔन म्हणाला की मी तुम्हांस तोच सल्ला देत आहे, जो स्वत: मी पाहत आहे. आणि मी तर तुम्हांस भलाईचा मार्गच दाखवीत आहे. [१२] (२९)

وَقَالَ الَّذِىٓ ءَامَنَ يَٰقَوْمِ إِنِّىٓ أَخَافُ عَلَيْكُم مِّثْلَ يَوْمِ
الْأَحْزَابِ ﴿٣٠﴾

त्या ईमानवाल्यांने म्हटले, हे माझ्या (समाजाच्या) लोकांनो! मला तर अंदेशा वाटतो की, तुमच्यावरसुद्धा (वाईट) दिवस न येवो, जी आणखी समूहांवर आली होती. (३०)

مِثْلَ دَأْبِ قَوْمِ نُوحٍ وَعَادٍ وَثَمُودَ وَالَّذِينَ مِنۢ
بَعْدِهِمْ ۚ وَمَا اللَّهُ يُرِيدُ ظُلْمًا لِّلْعِبَادِ ﴿٣١﴾

जशी, नूह आणि आद आणि समूद, आणि त्यांच्या नंतरच्या लोकांची (स्थिती झाली) [१३] अल्लाह आपल्या सेवकांवर कोण्या प्रकारचा जुलूम करू इच्छित नाही. [१४] (३१)

१) फिरऔन हे काम पूर्वीपण करीत होता. की, मूल जन्माला न यावे, जे ज्योतिष्यांच्या भविष्यवाणीप्रमाणे त्याच्या राज्यपदाला धोक्याला कारणीभूत व्हावे. हा दुसऱ्यादा हुकूम त्याने ह.मूसा عليه السلام च्या बेइज्जतीसाठी आणि कमीपणासाठी दिला. तसेच या साठी, की बनी इस्राईलने मूसा عليه السلام च्या अस्तित्वाला आपल्याकरीता संकट आणि दुर्भाग्याला कारणीभूत समजावे. जसे की, खरोखर त्यांनी म्हटले ''हे मूसा ! तुझ्या येण्याच्या पूर्वीसुद्धांआम्ही त्रासांत व्यस्त होतो, आणि तुझ्या आल्यावर सुद्धा, आमची हीच अवस्था आहे.'' (सू.आअराफ-१२९)

२) म्हणजे याच्याने जो हेतू तो साध्य करू इच्छित होता की, बनी इस्राईलच्या शक्तीत वाढ, आणि त्यांच्या मानहानीत कमीपणा न यावा, हा हेतू त्याला साध्य झाला नाही. किंबहुना अल्लाहने फिरऔन आणि त्याच्या लोकांना बुडवून टाकले. आणि बनी इस्राईलला आशीर्वादित भूमीचा वारस बनविले.

३) हे फिरऔनने कदाचित् त्या लोकांना म्हटले, जे त्याला मूसाला ठार करण्यापासून मना करीत होते.
४) हे फिरऔनाच्या उघड शिरजोरीचे प्रदर्शन आहे की, मी पाहील, त्याचा पालनकर्ता त्याला कसे वाचवितो. त्याला त्याने बोलावून पहावे. किंवा पालनकर्त्यालाच नाकारणे आहे की याचा कोणता पालनकर्ता आहे. जो वाचवून घेईल. कारण की पालनकर्ता तर तो आपल्या स्वत:ला म्हणवीत होता.
५) म्हणजे अल्लाहशिवाय इतरांच्या उपासनांकडून फिरवून, एका अल्लाहच्या उपासनेवर न लाऊन द्यावे. किंवा याच्यामुळे फिसाद न घडून यावा. अर्थ हा होता की, याचे आमंत्रण जर माझ्या समाजाच्या काही लोकांनी मान्य करून घेतले, तर ते मान्य न करणाऱ्याबरोबर वादविवाद व तक्रार करतील. ज्यामुळे यांच्या दर्म्यान लढाई झगडा होईल, जो फिसादाला कारणीभूत होईल. अशापक्रारे त्याने एकेश्वरवादाच्या आमंत्रणाला फिसादाचा सबब, आणि एकेश्वरवाद्यांना फिसादी ठरविले. वास्तविक पाहता तो स्वत: फिसादी होता. आणि अल्लाहशिवाय इतरांची उपासनाच फिसादाचे मूळ आहे.
६) ह.मूसा ﷺ च्या लक्षात जेव्हा ही गोष्ट आली की, फिरऔन मला ठार मारण्याचा इरादा बाळगतो. तेव्हा त्यांनी अल्लाहजवळ त्याच्या वाईटपणापासून वांचण्याची प्रार्थना केली. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला जेव्हा शत्रुंचे भय असे तेव्हा ही दुआ म्हणत. ''अल्लाहुम्मा इन्ना नज्अलुका फी नुहुरिहिम व नाऊजु बिका मिन् शुरुरिहिम'' (मुसनद अहमद ४१५/४) ''हे अल्लाह! आम्ही तुला यांच्या मुकाबल्यात करतो. आणि खोडसाळ पणापासून, तुझा आश्रय मागीत आहोत.''
७) म्हणजे अल्लाहच्या पालकत्वावर तो ईमान असेच ठेवित नसे. किंबहुना त्याच्याजवळ योग्य स्पष्ट अशी प्रमाणे होती.
८) हे त्याने त्याचा दर्जा कमी करावयाचा म्हणून सांगितले की, जर त्याच्या प्रमाणांनी तुम्ही समाधानी नाही, आणि त्याचा खरेपणा, आणि त्याचे आमंत्रण तुम्हास योग्य वाटत नाही तरी सुद्धा, बुद्धी, शहाणपणा आणि सारासार विचारांचा तगादा आहे की, त्याला त्याच्या स्थितीवर सोडून देण्यांत यावे. त्याला मना करण्यात येऊ नये. जर तो लबाड आहे, तर अल्लाहतआला स्वत:च त्याला या लबाडीची शिक्षा इहलोकांत व परलोकांत देऊन टाकील. आणि जर तो खरा आहे, आणि तुम्ही त्याला इजा पोहचविल्या; तर मग खचित्च तो तुम्हास ज्या शिक्षापासून भिववित आहे, तुमच्यावर त्याच्यातून कोणी शिक्षा येऊ शकते.
९) याचा अर्थ आहे की, जर तो लबाड असता, (जसे की तुम्ही म्हणतात) तर अल्लाहतआला त्याला प्रमाणे आणि चमत्कार बहाल न करता. जेव्हाकी त्याच्याजवळ या गोष्टी हजर आहेत. दुसरा अर्थ हा आहे की, जर तो लबाड आहे. तर अल्लाहतआला स्वत:च त्याला अपमानित आणि नष्ट करून टाकेन, तुम्हांस त्याच्या विरुद्ध काही पावले उचलण्याची आवश्यकता नाही.
१०) म्हणजे अल्लाहचा हा तुमच्यावर उपकार आहे की, त्याने तुम्हाला देशात वर्चस्व दिले. त्याचे आभार माना! आणि त्याच्या पैगंबराला खोटे ठरवून, अल्लाहची नाराजी ओढवून घेऊ नका.
११) हे सैनिक आणि सैन्य तुमच्या काहीच कामा येणार नाहीत. ते अल्लाहच्या शिक्षेला टाळूशकणार नाही, जर ती येऊन पोहचेल. येथपर्यंत त्या ईमानवाल्यांचे कथन होते, ज्याने ईमान लपवून ठेवले होते.
१२) फिरऔनने आपल्या ऐहिक प्रतिष्ठा आणि मातब्बरीच्या आधारावर खोटे सांगितले. आणि म्हणाला जे काही मी पाहत आहे, तेच तुम्हास सांगत आहे. आणि माझा दाखविलेला मार्गच बरोबर आहे. वास्तविक असे नव्हते. 'वमा अमरु फिरऔना बि रशीद' (सू.हूद-९७) (आणि फिरऔनचा कुठलाही हुकूम ठीक नव्हता)
१३) हे त्या ईमानवाल्या माणसाने दुसऱ्यादा आपल्या लोकांना भिवविले की, जर आम्ही अल्लाहच्या पैगंबराला खोटे ठरवण्यावर अडिग राहिलोत, तर धोका आहे की मागील लोकांप्रमाणे, अल्लाहच्या शिक्षेच्या पकडीत आम्ही येऊन जाऊ.
१४) म्हणजे अल्लाहने ज्यांना पण नष्ट केले, त्यांच्या अपराधांच्या पायमल्लीत, आणि पैगंबरांना खोटे ठरविणे आणि त्यांचा विरोध केल्यामुळेच नष्ट केले; नाहीतर तो कनवाळूआणि दयाळू पालनकर्ता, आपल्या सेवकांवर जुलूम करण्याचा इरादाच करीत नाही. जणू लोकांचे नष्ट होणे, हा त्यांच्यावर अल्लाहचा जुलूम नाही. किंबहुना बदल्याच्या कायद्याच्या अंतर्गत एक आवश्यक परिणाम आहे. ज्यापासून कुठलाही समाज व व्यक्ती वगळली जात नाही.

وَيٰقَوْمِ اِنِّيْٓ اَخَافُ عَلَيْكُمْ يَوْمَ التَّنَادِ ﴿٣٢﴾

**आणि हे माझ्या समाज बांधवांनो! मला तुमच्यावर हांकाहांकीच्या दिवसाचे पण भय आहे.[१] ३२**

يَوْمَ تُوَلُّوْنَ مُدْبِرِيْنَ ۚ مَا لَكُمْ مِّنَ اللّٰهِ مِنْ عَاصِمٍ ۚ وَمَنْ يُّضْلِلِ اللّٰهُ فَمَا لَهٗ مِنْ هَادٍ ﴿٣٣﴾

**ज्या दिवशी तुम्ही पाठ फिरवून परत याल.[२] तुम्हास अल्लाहतआला कडून वाचविणारा कोणी असणार नाही. आणि ज्याला अल्लाह आडमार्गी भटकवून देईल, त्याला मार्ग दाखविणारा कोणी नाही.[३] ३३**

وَلَقَدْ جَآءَكُمْ يُوْسُفُ مِنْ قَبْلُ بِالْبَيِّنٰتِ فَمَا زِلْتُمْ فِيْ شَكٍّ مِّمَّا جَآءَكُمْ بِهٖ ۚ حَتّٰٓى اِذَا هَلَكَ قُلْتُمْ لَنْ يَّبْعَثَ اللّٰهُ مِنْۢ بَعْدِهٖ رَسُوْلًا ۚ كَذٰلِكَ يُضِلُّ اللّٰهُ مَنْ هُوَ مُسْرِفٌ مُّرْتَابُ ﴿٣٤﴾

**आणि याच्यापूर्वी तुमच्याजवळ (हजरत) यूसुफ प्रमाणे घेऊन आलेत.[४] तरी सुद्धा, त्यांनी आणलेल्या (प्रमाणा) मध्ये तुम्ही शंकाकुशंका काढीत राहिलात.[५] येथ पावेतो की, जेव्हा ते मरण[६] पावले, तेव्हा म्हणू लागले की, अल्लाह याच्यानंतर कोण्या पैगंबराला पाठविणारच नाही.[७] अशाचप्रकारे अल्लाह आडमार्गी भटकवितो, प्रत्येक त्या माणसाला जो मर्यादेबाहेर जाणारा आणि शंकाकुशंका काढणारा असेल[८] ३४**

الَّذِيْنَ يُجَادِلُوْنَ فِيْٓ اٰيٰتِ اللّٰهِ بِغَيْرِ سُلْطٰنٍ اَتٰىهُمْ ۚ كَبُرَ مَقْتًا عِنْدَ اللّٰهِ وَعِنْدَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا ۚ كَذٰلِكَ يَطْبَعُ اللّٰهُ عَلٰى كُلِّ قَلْبِ مُتَكَبِّرٍ جَبَّارٍ ﴿٣٥﴾

**जो कोठल्याही सनदीशिवाय जी त्यांच्याजवळ आली असेल, अल्लाहच्या निशाण्यात झगडतात.[९] अल्लाहजवळ आणि ईमानवाल्या जवळ हे तर फारच मोठे द्वेष्य (नापसंत कृत्य) आहे.[१०] अल्लाहतआला अशाचप्रकारे प्रत्येक गर्विष्ठ व शिरजोराच्या अंत:करणावर मोहोर लावून देत असतो.[११] ३५**

وَقَالَ فِرْعَوْنُ يٰهَامٰنُ ابْنِ لِيْ صَرْحًا لَّعَلِّيْٓ اَبْلُغُ الْاَسْبَابَ ﴿٣٦﴾

**फिरऔन म्हणाला हे हामान! माझ्याकरिता एक उंच इमारत बनीव.[१२] की, मी आकाशाच्या त्या दरवाज्यांपर्यंत पोहचून जावे. ३६**

اَسْبَابَ السَّمٰوٰتِ فَاَطَّلِعَ اِلٰٓى اِلٰهِ مُوْسٰى وَاِنِّيْ لَاَظُنُّهٗ كَاذِبًا ۚ وَكَذٰلِكَ زُيِّنَ لِفِرْعَوْنَ سُوْٓءُ عَمَلِهٖ وَصُدَّ عَنِ السَّبِيْلِ ۚ وَمَا كَيْدُ فِرْعَوْنَ اِلَّا فِيْ تَبَابٍ ﴿٣٧﴾

**जे आकाशाचे दारे आहेत. आणि मूसाच्या उपास्याला डोकावून पहावे,[१३] मला तर पूर्ण खात्री आहे की तो लबाड आहे.[१४] आणि अशा प्रकारे फिरऔनाची कुकृत्ये त्याला सुशोभित करून दाखविण्यात आली.[१५] आणि सन्मार्गापासून अडवून टाकण्यात आले[१६] आणि फिरऔनाची (प्रत्येक) युक्ती नासाडीतच राहिली.[१७] ३७**

وَقَالَ الَّذِيْٓ اٰمَنَ يٰقَوْمِ اتَّبِعُوْنِ اَهْدِكُمْ سَبِيْلَ الرَّشَادِ ﴿٣٨﴾

**आणि त्या ईमानवाल्या माणसाने म्हटले की (हे माझ्या समाज बांधवांनो!) तुम्ही (सर्व) माझे अनुकरण करा. मी तुम्हास सरळ मार्ग दाखवून देईन.[१८] ३८**

يٰقَوْمِ اِنَّمَا هٰذِهِ الْحَيٰوةُ الدُّنْيَا مَتَاعٌ ۡ وَّاِنَّ الْاٰخِرَةَ هِيَ دَارُ الْقَرَارِ ﴿٣٩﴾

**हे माझ्या बांधवांनो! ऐहिक जीवन क्षणभंगूर आहे.[१९] (लक्षात ठेवा की, स्थिर) आणि नित्याचे घर तर परलोकच आहे.[२०] ३९**

१) तनादीचा अर्थ आहे, एक दुसऱ्याला बोलाविणे; कयामतला यौमत् तनाद यासाठी म्हटले आहे की, त्या दिवशी एक दुसऱ्याला बोलावतील. स्वर्गवाले नर्कवाल्यांना, आणि नर्कवाले स्वर्गवाल्यांना आवाज देतील. (सू.अअराफ:४८-४९) काही म्हणतात की, तराजू जवळ एक देवदूत असेल; ज्याचे पुण्याचे पारडे हलके होईल, त्याच्या दर्भाग्याला, हा देवदूत ओरडून जाहीर करील. काही म्हणतात की, कर्मांच्या अनुसार, लोकांना बोलाविले जाईल. स्वर्गवाल्यांना अहो स्वर्गवाले! आणि नर्कवाल्यांना अहो नर्कवाल्यांनो ! इमाम इब्ने कसीर म्हणतात, की इमाम बगवीचे हे कथन फार चांगले आहे की, या सर्व गोष्टीमुळेच, हे नाव ठेवण्यात आले आहे.

२) म्हणजे हशरच्या मैदानापासून, नरकाग्नीकडे जाल. किंवा हिशेबानंतर तेथून पळाल.

३) जो त्यांना हिदायतचा मार्ग दाखवू शकेल. म्हणजे ज्यावर चालवू शकेल.

४) म्हणजे अहो इजिप्तवाल्यांनो! ह. मूसा عليه السلام च्या पूर्वी तुमच्या या इलाख्यांत ज्यात तुम्ही रहातात, ह.यूसुफ عليه السلام पण प्रमाणे आणि पुरावे घेऊन आले होते. ज्यात तुमच्या वाडवडीलांना ईमानाचे आमंत्रण देण्यात आले होते. म्हणजे

'जाअकुम्' ने अभिप्रेत 'जाअ् इला आबाईकुम्' आहे. म्हणजे तुमच्या वाडवडीलांकडे आले.
५) परंतु तुम्ही त्यांच्यावर पण ईमान आणले नाही. आणि त्यांच्या आमंत्रणात शंका कुशंका काढित राहिलेत.
६) म्हणजे पैगंबर यूसुफ عليه السلام मरण पावलेत.
७) म्हणजे तुमच्या नेहमीची चाल कारण की प्रत्येक पैगंबरांना खोटे ठरवणे आणि विरोधच राहिला आहे. म्हणून समजत होते की, आता कोणी पैगंबरच येणार नाही; किंवा हा अर्थ आहे की, पैगंबराचे येणे अथवा न येणे, तुमच्याकरीता समान आहे. किंवा असा अर्थ ध्वनित होतो की, आताअसा महान मानव कोठे जन्माला येऊ शकतो, ज्याला पैगंबरी बहाल केली जावी. जणुं ह.यूसुफ عليه السلام च्या मृत्यूनंतर त्यांच्या मोठेपणाला मान्य करण्यात आले होते. आणि पुष्कळसे लोक प्रत्येक महत्त्वाच्या माणसाच्या मृत्यूनंतरच त्याच्या मोठेपणाबद्दल बोलतात.
८) म्हणजे या स्पष्ट बहकण्यानंतर, ज्यात तुम्ही व्यस्त आहात, अल्लाहतआला प्रत्येक त्या माणसाला सुद्धा मार्गभ्रष्ट करतो, जो भरपूर प्रमाणात गुन्हे करतो. आणि अल्लाहचा धर्म, त्याचा एकेश्वरवाद आणि त्याच्या वायदे आणि धमक्या यांच्यात शंका काढतो.
९) म्हणजे अल्लाहकडून उतरलेले कोणी प्रमाण यांचे जवळ नाही; असे असून सुद्धा, अल्लाहचा एकेश्वरवाद, आणि त्याच्या आदेशांमध्ये वितंडवाद घालतात, जशी की प्रत्येक काळांतील मिथ्यावादींची चाल राहिली आहे.
१०) म्हणजे त्यांच्या या वाईट कृत्यांमुळे, अल्लाहतआलाच नाराज होत नाही, ईमानवाले सुद्धा याला फारच नापसंत करतात.
११) म्हणजे ज्याप्रमाणे त्या वितंडवाद घालणाऱ्यांचे अंत:करणावर मोहोर लावून देण्यात आली; अशाचप्रकारे प्रत्येक त्या माणसाच्या अंत:करणावर मोहोर लावून देण्यात येते, जो अल्लाहच्या निशाण्यांच्या मुकाबल्यात गर्व आणि शिरजोरी करतो. ज्याच्यानंतर योग्य त्यांना योग्य वाटत नाही. मना केलेल्या गोष्टी त्यांना मना केलेल्या वाटत नाही. किंबहुना कित्येकवेळा योग्य गोष्टी त्यांना मना केलेल्या गोष्टी सारख्या वाटू लागतात.
१२) हे फिरऔनाची शिरजोरी आणि गर्विष्टपणाचे वर्णन आहे की, त्याने आपला मंत्री हामानला एक उंच इमारत बांधण्याचा हुकूम दिला की तिच्यामुळे तो आकाशाच्या दरवाज्यापर्यंत पोहचवून जावा. असबाब चा अर्थ दरवाजे किंवा रस्ते आहेत. (आणखी पहावे सू.कसस, आ.-३८)
१३) म्हणजे पहा की, काय खरोखर आकाशांवर कोणी अल्लाह आहे?
१४) या गोष्टीत की, आकाशावर अल्लाह आहे, जो आकाश आणि पृथ्वीचा निर्माणकर्ता आणि त्यांचा व्यवस्थापक आहे. किंवा या गोष्टीत की, तो अल्लाहचा पाठविलेला पैगंबर आहे.
१५) म्हणजे शैतानाने अशा प्रकारे बहकवून ठेवले, आणि त्याची कुकृत्ये त्याला सुशोभित दिसत राहिलीत.
१६) म्हणजे सत्य आणि योग्य मार्गापासून त्याला अडवून देण्यात आले आणि तो आडमार्गांच्या मोहजालात भटकत राहिला.
१७) तबाब, तोटा, नष्टचर्य म्हणजे फिरऔनाने जी युक्ती अंगिकारली, त्याचा परिणाम त्याच्यासाठी वाईटच निघाला. आणि सरशेवटी आपल्या सैन्यासह पाण्यात बुडवून देण्यात आला.
१८) फिरऔनाच्या लोकांमधून ईमान आणणारा पुन्हा बोलू लागला, आणि म्हणाला की दावा तर फिरऔन पण करीत आहे की, मी तुम्हास सरळ मार्गावर चालवित आहे. परंतु हकीकत ही आहे की, फिरऔन बहकलेला आहे; मी जो मार्ग तुम्हास दाखवित आहे. तो सरळ मार्ग आहे. आणि तोच मार्ग आहे, ज्याकडे ह.मूसा عليه السلام तुम्हास आमंत्रण देत आहेत.
१९) ज्याचे जीवन थोड्या दिवसांकरीता आहे. आणि ते सुद्धा परलोकाच्या तुलनेत सकाळ किंवा संध्याकाळ एका घटकेच्या बरोबर.
२०) ज्याचा ऱ्हास किंवा नष्ट होणे नाही. तसेच तेथे मृत्यू किंवा तेथून जाणे नाही. कोणी स्वर्गांत जावो अथवा नरकाग्नीत, दोघांची जीवने नित्याची असतील. एक सुखाचे आणि आरामाचे जीवन, दुसरे दुर्दैवी आणि शिक्षेचे जीवन. मृत्यू स्वर्गवाल्यांना येईल न नर्कवाल्यांना.

مَنْ عَمِلَ سَيِّئَةً فَلَا يُجْزَىٰٓ إِلَّا مِثْلَهَا ۖ وَمَنْ عَمِلَ صَالِحًا مِّن ذَكَرٍ أَوْ أُنثَىٰ وَهُوَ مُؤْمِنٌ فَأُولَٰٓئِكَ يَدْخُلُونَ الْجَنَّةَ يُرْزَقُونَ فِيهَا بِغَيْرِ حِسَابٍ ﴿٤٠﴾

**ज्याने वाईट कर्म केले आहे, त्याला तर तसलाच मोबदला मिळेल.** [१] **आणि ज्याने पुण्य कर्म केले आहे, मग जरी तो पुरूष असो किंवा स्त्री, आणि ते ईमानवाले असतील, तर हे लोक** [२] **स्वर्गांत जातील. आणि तेथे त्यांना भरपूर अन्नसंपत्ती दिली जाईल.** [३] (४०)

وَيَٰقَوْمِ مَا لِىٓ أَدْعُوكُمْ إِلَى النَّجَوٰةِ وَتَدْعُونَنِىٓ إِلَى النَّارِ ﴿٤١﴾

**हे माझ्या लोकांनो! ही काय गोष्ट आहे की, मी तुम्हास मुक्तीकडे बोलावित आहे;** [४] **आणि तुम्ही मला नरकाग्नीकडे बोलावित आहात** [५] (४१)

تَدْعُونَنِى لِأَكْفُرَ بِاللَّهِ وَأُشْرِكَ بِهِۦ مَا لَيْسَ لِى بِهِۦ عِلْمٌ وَأَنَا۠ أَدْعُوكُمْ إِلَى الْعَزِيزِ الْغَفَّٰرِ ﴿٤٢﴾

**तुम्ही मला हे आमंत्रण देत आहात की, अल्लाहबरोबर कुफ्र करा, आणि त्याच्या बरोबर शिर्क करा, ज्याचे काही ज्ञान माझ्या जवळ नाही. आणि मी तुम्हास सामर्थ्यवान, क्षमाकर्ता (उपास्या) कडे बोलावित आहे.** [६] (४२)

لَا جَرَمَ أَنَّمَا تَدْعُونَنِىٓ إِلَيْهِ لَيْسَ لَهُۥ دَعْوَةٌ فِى الدُّنْيَا وَلَا فِى الْءَاخِرَةِ وَأَنَّ مَرَدَّنَآ إِلَى اللَّهِ وَأَنَّ الْمُسْرِفِينَ هُمْ أَصْحَٰبُ النَّارِ ﴿٤٣﴾

**ही निश्चित गोष्ट** [७] **आहे की, तुम्ही मला ज्याकडे बोलावीत आहात त्याला इहलोकांत बोलाविणे योग्य नाही;** [८] **आणि न परलोकांत.** [९] **आणि ही (पण निश्चित गोष्ट आहे की) आम्हा सर्वांचे परतून जाणे अल्लाहकडेच आहे.** [१०] **आणि मर्यादेच्या बाहेर जाणारे (खचितच) नर्काग्नीवाले आहेत.** [११] (४३)

१) म्हणजे कुकृत्याप्रमाणेच मोबदला राहील. जास्त राहणार नाही. आणि त्याच्याप्रमाणेच शिक्षा राहील. जो न्यायाचा नमुना असेल.

२) म्हणजे ते जे ईमानदारपण असतील आणि त्याच बरोबर सुकृत्य करणारे सुद्धा. याचा स्वच्छ अर्थ हा आहे की, सुकृत्यांशिवाय ईमानाची किंवा ईमानाशिवाय सुकृत्यांची, अल्लाहजवळ काही किंमत राहणार नाही. अल्लाहजवळ सफलतेकरिता, ईमानाबरोबर सुकृत्य, आणि सुकृत्याबरोबर ईमान, आवश्यक आहे.

३) म्हणजे अंदाज आणि हिशेबाशिवाय, देणग्या मिळतील. आणि त्यांच्या संपून जाण्याची भीती पण असणार नाही.

४) आणि ते हे की, फक्त एका अल्लाहची उपासना करा. ज्याचा कोणी सरकतदार नाही. आणि त्याच्या या पैगंबराला खरे माना, ज्याला त्याने तुमच्या हिदायत आणि मार्गदर्शनाकरीता पाठविला आहे.

५) म्हणजे एकेश्वरवादाऐवजी शिर्कचे आमंत्रण देत आहात. जे मनुष्याला नरकाग्नीत घेऊन जाणार आहे. जसे की पुढील महावाक्यात स्पष्टीकरण आले आहे.

६) अजीज (सामर्थ्यवान) जो काफिरांकडून बदला घेण्यात आणि त्यांना शिक्षा देण्यास समर्थ आहे. 'गफ्फार' जो आपल्या मानणाऱ्यांच्या चुका आणि कोतायांना क्षमा करून टाकणारा,आणि त्यांना लपवून ठेवणारा. जेव्हा की तुम्ही, ज्यांची उपासना करावयांस मला सांगत आहात, त्या फारच क्षुल्लक आणि कनिष्ठ प्रकारच्या वस्तूआहेत; न त्या ऐकू शकतात, न उत्तर देऊ शकतात. न कोणाला फायदा पोहचविण्यास सक्षम आहे, न नुकसान पोहोचविण्यावर.

७) 'ला जरम', ही गोष्ट नक्की आहे, किंवा याच्यात काहीही खोटे नाही.

८) म्हणजे कोणाचे बोलविणे ऐकण्याची क्षमता बाळगत नाही की, कोणास नफा पोहचवूशकावा. किंवा उपास्य होण्याचा हक्क त्यांना प्राप्त असावा. याचा जवळ जवळ तोच भावार्थ आहे, जो हे महावाक्य आणि याच्यासारख्या अनेक महावाक्यांमध्ये सांगण्यांत आला आहे; ''आणि यापेक्षा जास्त बहकलेला कोण असेल? जो अल्लाहशिवाय अशांना बोलावितो, जे कयामतपर्यंत त्याची दुआ मान्य करू शकणार नाही. परंतु त्यांच्या बोलविण्यापासून निव्वळ बेखबर असतील.'' (सू.अहकाफ-५) ''जर तुम्ही त्यांना बोलवाल, तर ते तुमचे बोलाविणे ऐकतच नाही. आणि समजा जर ऐकूनच घेतले, तर मान्य करूंशकत नाही.'' (सू.फातिर-१४)

९) म्हणजे परलोकांतच ते बोलाविणे ऐकून कोणाला शिक्षेपासून सोडविण्यास किंवा शिफारस करण्यास समर्थ असतील? हे पण शक्य नाही. अशा वस्तू बरे कशा लायक होऊ शकतात की, त्यांनी उपास्य बनावे आणि त्यांची उपासना केली जावी!

१०) जेथे प्रत्येकाचा हिशेब होईल आणि कर्माप्रमाणे चांगला किंवा वाईट बदला दिला जाईल.

११) म्हणजे काफिर आणि मुशरिक जे अल्लाहच्या आज्ञाभंगात प्रत्येक मर्यादेच्या बाहेर निघून जातात. अशा प्रकारे जे फार जास्त गुन्हेगार मुसलमान असतील; ज्यांचे आज्ञाभंजन 'अति' च्या मर्यादे पर्यंत पोहचून गेले असेल, त्यांना पण काही काळ, नर्काग्नीची शिक्षा भोगावी लागेल. तथापि नंतर रसूल करीम ﷺ ची शिफारस किंवा अल्लाहच्या मर्जीने त्यांना नरकाग्नीतून काढून, स्वर्गांत दाखल करून दिले जाईल.

فَسَتَذْكُرُوْنَ مَآ اَقُوْلُ لَكُمْ ؕ وَاُفَوِّضُ اَمْرِيْٓ اِلَى اللّٰهِ ؕ اِنَّ اللّٰهَ بَصِيْرٌۢ بِالْعِبَادِ ﴿٤٤﴾

**तर पुढे जाता तुम्ही माझ्या गोष्टींची आठवण कराल.** [१] **मी माझा मामला अल्लाहच्या हवाली करीत आहे.** [२] **नि:संशय अल्लाहतआला आपल्या सेवकांस पाहणारा आहे.** [३] (४४)

فَوَقٰىهُ اللّٰهُ سَيِّاٰتِ مَا مَكَرُوْا وَحَاقَ بِاٰلِ فِرْعَوْنَ سُوْٓءُ الْعَذَابِ ﴿٤٥﴾

**तर त्याला अल्लाहतआलाने तमाम दुष्कृत्यापासून सुरक्षित ठेवून घेतले. जी त्यांनी विचार करून ठेवली होती.** [४] **आणि फिरऔनवाल्यावर वाईट प्रकारे शिक्षाउलटून पडली.** [५] (४५)

اَلنَّارُ يُعْرَضُوْنَ عَلَيْهَا غُدُوًّا وَّعَشِيًّا ۚ وَيَوْمَ تَقُوْمُ السَّاعَةُ ۫ اَدْخِلُوْٓا اٰلَ فِرْعَوْنَ اَشَدَّ الْعَذَابِ ﴿٤٦﴾

**आग आहे जिच्यासमोर हे प्रत्येक सकाळ संध्याकाळ आणले जातात.** [६] **आणि ज्या दिवशी कयामत घडून येईल (हुकूम होईल की), फिरऔनच्या लोकास अतिशय कडक शिक्षेत टाकून द्या.** [७] (४६)

१) लवकरच ती वेळ येईल जेव्हा माझ्या गोष्टीचा खरेपणा आणि मी ज्या गोष्टीपासून मना करीत होतो, त्यांची ओळख तुमच्यावर स्पष्ट होऊन जाईल; मग तुम्ही पश्चात्ताप व्यक्त कराल. परंतु ती वेळ अशी असेल की, पश्चात्ताप व्यक्त करणे काही फायदा देणार नाही.

२) म्हणजे त्याच्यावर भरोसा करतो. आणि त्याच्याजवळ नेहमी मदत मागतो. आणि तुमच्याकडून अलिप्तता आणि संबंध विच्छेदाची घोषणा करतो.

३) तो त्यांना पाहत आहे. मग तो ज्यांना हिदायतला पात्र समजतो, त्यांना हिदायत बहाल करतो. आणि बहकण्याला जे पात्र आहे, त्यांना आडमार्गी भटकवून देतो. या गोष्टीत जी प्रयुक्ती आहे, तिला तोच चांगल्या प्रकारे जाणतो.

४) म्हणजे त्याचा समाज, किब्त्यांनी त्या ईमानवाल्याच्या सत्य सांगण्याने, त्याच्या विरूद्ध ज्या युक्त्या कारस्थाने, करावयाचे ठरवून ठेवले होते, त्या सर्वांना अयशस्वी करून टाकले. आणि त्याला ह.मूसा عليه السلام बरोबर मुक्ती देऊन दिली. आणि परलोकात त्याचे घर स्वर्ग असेल.

५) म्हणजे जगांत त्यांना समुद्रांत बुडवून टाकण्यात आले. आणि परलोकांत त्यांच्यासाठी नरकाग्नीची अतिशय कडक शिक्षा आहे.

६) या आगीवर, 'बर्जख' मध्ये, म्हणजे कबरीमध्ये, ते लोक दररोज सकाळ संध्याकाळ सादर केले जातील. ज्याच्याने थडग्याची शिक्षा (अजाबे कब्र) सिद्ध होतो. ज्याचा काही लोक इन्कार करतात. हदीर्शीमध्ये तर मोठ्या खुलाशासह कब्रच्या अजाबवर प्रकाश टाकण्यात आला आहे. उदाहरणार्थ ह.आयेशा रजी अल्लाहो अनहाच्या प्रश्नाच्या उत्तरात नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''होय! कब्रचा अजाब सत्य आहे.'' (स.बुखारी) अशाच प्रकारे एका आणखी हदीसमध्ये सांगण्यात आले, ''जेव्हा तुमच्यातून कोणी मरतो, तेव्हा (कबर मध्ये) सकाळ संध्याकाळ त्याच्यावर त्याचे ठिकाण सादर केले जाते. म्हणजे तो स्वर्गवासी आहे तर स्वर्ग, आणि नर्कवासी आहे तर नरकाग्नी त्याच्या समोर केले जातात. आणि सांगण्यात येते की, हे तुझे मूळ ठिकाण आहे. जेथे कयामतच्या दिवशी अल्लाहतआला तुला पाठवील.'' (स.बुखारी, स.मुस्लिम) याचा अर्थ आहे की कब्रच्या अजाबाला नाकारणारे कुरआन आणि हदीश दोहोंच्या स्पष्टतेला मान्य करीत नाही.

७) याच्याने अगदी स्पष्ट आहे की, आगीवर सादर करण्याचा मामला, जो सकाळ संध्याकाळ होतो, कयामतच्या पूर्वीचा आहे. आणि कयामतच्या पूर्वी बर्जख किंवा कबरचेच जीवन आहे. कयामतच्या दिवशी यांना कबरेतून काढून, कडक शिक्षा म्हणजे नरकाग्नीत टाकून देण्यात येईल. आले फिरऔन ने अभिप्रेत फिरऔन त्याचा सर्व समाज, आणि त्याचे सारे अनुकरण करणारे आहेत. हे म्हणणे की आम्हांस तर कबरीमध्ये मृत आरामांत पडलेला दिसून येतो; त्याला जर शिक्षा होत असेल, तर तो अशा प्रकारे दिसणार नाही. ही गोष्ट निरर्थक आहे, कारण की शिक्षेकरीता, हे आवश्यक नाही की, ती आम्हांस दिसावी, अल्लाहतआला सर्व प्रकारे शिक्षा देण्यास समर्थ आहे. काय आम्ही पहात नाही की, स्वप्नामध्ये एका माणसाला अतिशय भयानक दृष्ट पाहून कडक दु:ख आणि इजा जाणवते. परंतु पहाणाऱ्याला जरा पण जाणीव होत नाही. की हा स्वप्न पहाणारा मनुष्य अतिशय त्रासांत व्यस्त आहे. असा प्रत्यक्ष अनुभव असून सुद्धा, कब्रच्या अजाबाला नाकारणे, निव्वळ हटधर्मी आणि निरर्थक बळजबरी आहे. किंबहुना जागृतावस्थेत सुद्धा मनुष्याला जो त्रास होतो, तो स्वत: दिसत नाही; परंतु फक्त मनुष्याचे तडफडणे आणि तळमळणे दिसते. आणि ते पण त्यावेळी जेव्हा तो तडफडेल आणि तळमळेल.

وَإِذْ يَتَحَآجُّونَ فِي النَّارِ فَيَقُولُ الضُّعَفَٰٓؤُا۟ لِلَّذِينَ
اسْتَكْبَرُوٓا۟ إِنَّا كُنَّا لَكُمْ تَبَعًا فَهَلْ أَنتُم مُّغْنُونَ
عَنَّا نَصِيبًا مِّنَ النَّارِ ﴿٤٧﴾

आणि जेव्हा नरकाग्नीमध्ये ते एक दुसऱ्याशी झगडतील तेव्हा दुर्बल लोक गर्विष्ठांना, (ज्यांच्या हे आज्ञांकीत होते,) म्हणतील की, आम्ही तर तुमचे अनुकरण करणारे होतो. तर काय आता तुम्ही आमच्यावरून आगीचा कोणी भाग हटवूशकतात? (४७)

قَالَ الَّذِينَ اسْتَكْبَرُوٓا۟ إِنَّا كُلٌّ فِيهَآ إِنَّ اللَّهَ قَدْ
حَكَمَ بَيْنَ الْعِبَادِ ﴿٤٨﴾

ते मोठे लोक उत्तर देतील, आम्ही तर सर्वच या आगीत आहोत; अल्लाहतआला आपल्या सेवकांच्या दर्म्यान निर्णय करून चुकला आहे (४८)

وَقَالَ الَّذِينَ فِي النَّارِ لِخَزَنَةِ جَهَنَّمَ ادْعُوا۟ رَبَّكُمْ
يُخَفِّفْ عَنَّا يَوْمًا مِّنَ الْعَذَابِ ﴿٤٩﴾

आणि (सर्व) नर्कवासीय एकत्र येऊन नरकाग्नीच्या रखवालदारांना म्हणतील की, तुम्हीच आपल्या पालनकर्त्याजवळ प्रार्थना करा की, तो कोण्या दिवशी तरी आमच्या शिक्षेत कमी करेल. (४९)

قَالُوٓا۟ أَوَلَمْ تَكُ تَأْتِيكُمْ رُسُلُكُم بِالْبَيِّنَٰتِ قَالُوا۟ بَلَىٰ
قَالُوا۟ فَادْعُوا۟ وَمَا دُعَٰٓؤُا۟ الْكَٰفِرِينَ إِلَّا فِي ضَلَٰلٍ ﴿٥٠﴾

ते उत्तर देतील की, काय तुमच्याजवळ तुमचे पैगंबर चमत्कार घेऊन आले नव्हते? ते म्हणतील होय का नाही? आले होते. ते म्हणतील की मग तुम्हीच प्रार्थना करा. [१] आणि काफिरांचे प्रार्थना करणे केवळ व्यर्थच आहे. [२] (५०)

५ / ४३ / १०

إِنَّا لَنَنصُرُ رُسُلَنَا وَالَّذِينَ ءَامَنُوا۟ فِي الْحَيَوٰةِ الدُّنْيَا وَيَوْمَ
يَقُومُ الْأَشْهَٰدُ ﴿٥١﴾

नि:संशय आम्ही आपल्या पैगंबरांची आणि ईमानवाल्यांची मदत ऐहिक जीवनात पण करू. [३] आणि त्या दिवशी सुद्धा जेव्हा साक्ष देणारे उभे राहतील [४] (५१)

१) आम्ही अशा लोकांच्या बाबतीत अल्लाहकडे कसे काय म्हणूशकतो, ज्यांच्या जवळ अल्लाहचे पैगंबर प्रमाणे आणि चमत्कार घेऊन आलेत परंतु त्यांनी पर्वा केली नाही?

२) म्हणजे सरशेवटी ते स्वत:च अल्लाहकडे फिर्याद करतील. परंतु या फिर्यादीची काही दखल घेण्यात येणार नाही. यासाठी की, जगात त्यांच्यावर तर्क पूर्ण केला जाऊन चुकला होता. आता परलोक तर ईमान, तौबा आणि कर्माचे ठिकाण नाही. ते तर मोबदल्याचे घर आहे. जगांत जे काही केले असेल, त्याचा परिणाम तेथे भोगावा लागेल.

३) म्हणजे त्यांच्या (पैगंबराच्या) शत्रुंना फजित आणि त्यांना (पैगंबरांना आणि ईमानवाल्यांना) प्रबळ करू. काही लोकांच्या मनात ही शंका निर्माण होऊ शकते की, काही पैगंबरांना ठार करण्यात आले जसे ह. यह्या व ह.जकरिया अलैहिमस् सलाम वगैरे. आणि काहींना हिजरत करण्यास भाग पाडण्यात आले. जसे इब्राहीम عليه السلام आणि आमचे पैगंबर ﷺ आणि सहाबा किराम रिजवानुल्लाह् अलैहिम अजमईन. मदतीचे वचन असून सुद्धा असे का झाले? वास्तविक हे वचन, स्थिती आणि बहुसंख्येच्या अनुषंगाने आहे. म्हणून काही अवस्थांमध्ये आणि काही माणसांवर, काफिरांचे वर्चस्व याच्या विरुद्ध नाही. किंवा अर्थ हा आहे की, तात्पुरत्या स्वरुपात काही वेळाअल्लाहचे प्रयोजन आणि मर्जीच्या अंतर्गत, काफिरांना वर्चस्व देऊन दिले जाते. परंतु सरशेवटी ईमानवालेच प्रबळ आणि विजयी होतात. जसे ह. यह्या आणि जकरिया यांना ठार करणाऱ्यांवर नंतर अल्लाहतआलाने त्यांच्या शत्रुंना त्यांच्यावर लादून दिले. ज्यांनी त्यांच्या रक्ताने आपली तहान भागविली. आणि त्यांना फजित आणि अपमानित केले. ज्या यहूद्यांनी ह.ईसा عليه السلام ला सुळावर चढवून मारू इच्छिले, अल्लाहने त्या यहूद्यांवर रोमनांना असे वर्चस्व दिले की, त्यांनी यहूद्यांना फारच अपमानकारक शिक्षेची गोडी चाखविली. इस्लामचे पैगंबर ﷺ आणि त्यांचे साथीदार खचित्‌च हिजरत करण्यास भाग पाडले गेले. परंतु याच्यानंतर बद्रचे युद्ध, उहद, अहजाब, खैबरचे युद्ध, आणि मग मक्केच्या विजया मार्फत अल्लाहने ज्याप्रमाणे मुसलमानांची मदत केली आणि आपले पैगंबर आणि ईमानवाल्यांना ज्याप्रमाणे वर्चस्व प्रदान केले; याच्यानंतर अल्लाहच्या मदत करण्यात काय शंका रहाते? (इब्ने कसीर)

४) अशहाद, शहीद (साक्षीदार) चे अनेकवचन आहे. जसे शरीफचे अनेकवचन अशराफ आहे. कयामतच्या दिवशी देवदूत आणि पैगंबर साक्ष देतील. किंवा देवदूत या गोष्टीची साक्ष देतील की, हे अल्लाह! पैगंबरांनी तुझा संदेश पोहचवून दिला होता. परंतु त्यांच्या उम्मतींनी त्यांना खोटे ठरवले. याशिवाय उम्मते मुहम्मदिया आणि नबी करीम ﷺ पण साक्ष देतील. जसे की पहिले पण सांगण्यात आले आहे. म्हणून कयामतला साक्षीदारांच्या उभे रहाण्याचा दिवस, म्हणण्यात आले आहे. त्या दिवशी ईमानवाल्यांची मदत करण्याचा अर्थ, त्यांना त्यांच्या चांगल्या कर्मांचा मोबदला दिला जाईल आणि त्यांना स्वर्गांत दाखल करून दिले जाईल.

يَوْمَ لَا يَنفَعُ الظَّالِمِينَ مَعْذِرَتُهُمْ ۖ وَلَهُمُ اللَّعْنَةُ وَلَهُمْ سُوءُ الدَّارِ ﴿٥٢﴾

**त्या दिवशी जालिमांना त्यांच्या सबबी सांगणे आणि माफी मागणे काही फायदा देणार नाही. त्यांच्यासाठी धिक्कार असेल. [१] आणि त्यांच्या करीता वाईट घरच असेल. (५२)**

وَلَقَدْ آتَيْنَا مُوسَى الْهُدَىٰ وَأَوْرَثْنَا بَنِي إِسْرَائِيلَ الْكِتَابَ ﴿٥٣﴾

**आम्ही मूसाला सद्‌बोध प्रदान केला. [२] आणि बनु इस्राईलला या पुस्तकाचे वारस बनविले [३] (५३)**

هُدًى وَذِكْرَىٰ لِأُولِي الْأَلْبَابِ ﴿٥٤﴾

**की ते सन्मार्ग आणि उपदेश होते, बुद्धीमानांसाठी [४] (५४)**

فَاصْبِرْ إِنَّ وَعْدَ اللَّهِ حَقٌّ وَاسْتَغْفِرْ لِذَنبِكَ وَسَبِّحْ بِحَمْدِ رَبِّكَ بِالْعَشِيِّ وَالْإِبْكَارِ ﴿٥٥﴾

**तर हे पैगंबर! तू सहनशिलता पत्कर. अल्लाहचे अभिवचन, नि:संशय खरेच आहे. तू आपल्या अपराधांची [५] माफी मागीत रहा. आणि सकाळ संध्याकाळ [६] आपल्या पालनकर्त्याचे पावित्र्यवर्णन आणि स्तुती करीत रहा. (५५)**

إِنَّ الَّذِينَ يُجَادِلُونَ فِي آيَاتِ اللَّهِ بِغَيْرِ سُلْطَانٍ أَتَاهُمْ ۙ إِن فِي صُدُورِهِمْ إِلَّا كِبْرٌ مَّا هُم بِبَالِغِيهِ ۚ فَاسْتَعِذْ بِاللَّهِ ۖ إِنَّهُ هُوَ السَّمِيعُ الْبَصِيرُ ﴿٥٦﴾

**जे लोक आपल्याजवळ कुठलीही सनद नसतांना देखील, अल्लाहच्या निशाण्यांत झगडे करतात, त्यांच्या मनात आपल्या अभिमानाशिवाय काहीही नाही. ते याच्यापर्यंत कधीही पोहचूशकणार नाही. [७] तर तूअल्लाहचा आश्रय मागीत रहा. नि:संशय तो सर्व काही ऐकतो आणि सर्व काही पाहतो. (५६)**

لَخَلْقُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ أَكْبَرُ مِنْ خَلْقِ النَّاسِ وَلَٰكِنَّ أَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُونَ ﴿٥٧﴾

**आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, खचित्‌च मनुष्याच्या निर्मितीपेक्षा फार मोठे काम आहे. परंतु (ही वेगळी गोष्ट आहे की,) बहुतेक लोक जाणत नाहीत [८] (५७)**

१) म्हणजे अल्लाहच्या दयेपासून दूर, आणि धुत्कार आणि क्षमा याचनेचा फायदा यासाठी होणार नाही की, ती क्षमायाचनेची जागा नाही. म्हणून ही क्षमायाचना निरर्थक क्षमा याचना असेल.

२) म्हणजे पैगंबरी आणि तौरात प्रदान केले. जसे सांगितले, ''आम्ही तौरात अवतीर्ण केले, ज्यात सन्मार्ग आणि प्रकाश आहे.'' (सू.माइद: – ४४)

३) म्हणजे तौरात ह.मूसा ﷺ च्या नंतरसुद्धा बाकी राहिले. ज्याचे वंश परंपरेने ते वारस होत राहिले. किंवा पुस्तकाने ती सर्व पुस्तके अभिप्रेत आहेत, जी बनी इस्राईलच्या पैगंबरांवर अवतीर्ण झाली, या सर्व पुस्तकांचा वारस बनी इस्राईलला बनविले.

४) म्हणजे सन्मार्ग दाखवणारी आणि उपदेश करणारी. बुद्धीमानाने अभिप्रेत. योग्य आणि रास्त बुद्धीचे मालक आहेत. कारण की तेच आकाशी ग्रंथापासून फायदा उचलतात आणि हिदायत आणि उपदेश ग्रहण करतात. दुसरे लोक तर गाढवांसारखे आहेत, ज्यांच्यावर पुस्तकांचे ओझेतर लादलेले असते, पण ते यापासून बेखबर असतात की, या पुस्तकांमध्ये काय आहे?

५) गुन्हा ने अभिप्रेत त्या लहान लहान चुका आहेत; ज्या मानवी स्वभावाच्या तगाद्याने होऊन जातात. ज्यांची दुरुस्ती पण अल्लाहतआला कडून करून देण्यात येते. किंवा क्षमायाचना पण एक उपासनाच आहे. पुण्यप्रतिफलाच्या अधिकतेसाठी, इस्तगफार (क्षमायाचने) चा हुकूम देण्यात आला आहे किंवा उद्देश्य उम्मतीचे मार्गदर्शन आहे, की त्यांनी क्षमायाचनेपासून निरपेक्ष होऊ नये.

६) 'अशिय्यी' ने दिवसाच्या शेवटचा आणि रात्रीच्या सुरवातीचा भाग आणि 'इब्कार' ने रात्रीचा शेवटचा आणि दिवसाच्या सुरवातीचा भाग अभिप्रेत आहे.

७) म्हणजे ते लोक जे कुठल्याही आकाशी ग्रंथाच्या प्रमाणाशिवाय वादविवाद आणि हुज्जत घालतात. हे निव्वळ गर्वामुळे, असे करतात. तथापि याच्याने त्यांचा जो उद्देश्य आहे की, सत्य, दुर्बल व्हावे आणि निरर्थक मजबुत व्हावे, हा त्यांना प्राप्त होणार नाही.

८) म्हणजे मग हे का या गोष्टीला नाकारत आहे की, अल्लाहतआला माणसांना दुसऱ्यादा जिवंत करूशकत नाही? जेव्हाकी, हे काम आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीपेक्षा फार सोपे आहे.

وَمَا يَسْتَوِي الْأَعْمٰى وَالْبَصِيْرُ ۵ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا
الصّٰلِحٰتِ وَلَا الْمُسِيْٓءُ ؕ قَلِيْلًا مَّا تَتَذَكَّرُوْنَ ﴿٥٨﴾

**आंधळा आणि डोळस समान नाहीत. न ते लोक ज्यांनी ईमान आणले, आणि चांगली कामे केलीत, कुकृत्ये करणाऱ्यांच्या (समान आहेत)[५] तुम्ही (फार) कमी बोध ग्रहण करीत आहात ५८**

اِنَّ السَّاعَةَ لَاٰتِيَةٌ لَّا رَيْبَ فِيْهَا وَلٰكِنَّ اَكْثَرَ
النَّاسِ لَا يُؤْمِنُوْنَ ﴿٥٩﴾

**कयामत तर अवश्य येणारच आहे. तिच्यात कोण्या तऱ्हेची शंका नाही. (ही वेगळी गोष्ट आहे की बरेचसे) तीला मानत नाहीत ५९**

وَقَالَ رَبُّكُمُ ادْعُوْنِيْٓ اَسْتَجِبْ لَكُمْ ؕ اِنَّ الَّذِيْنَ
يَسْتَكْبِرُوْنَ عَنْ عِبَادَتِيْ سَيَدْخُلُوْنَ جَهَنَّمَ دٰخِرِيْنَ ﴿٦٠﴾

**आणि तुमच्या पालनकर्त्याचा आदेश (जारी होऊन चुकला) आहे की, माझ्याजवळ प्रार्थना करा, मी तुमच्या प्रार्थनांना मान्य करीन.[६] लक्षात ठेवा की, जे लोक माझ्या उपासनेपासून अहंकार करतात, ते लवकरच अपमानित होऊन, नरकाग्नीमध्ये पोहोचून जातील[७] ६०**

اَللّٰهُ الَّذِيْ جَعَلَ لَكُمُ الَّيْلَ لِتَسْكُنُوْا فِيْهِ وَالنَّهَارَ
مُبْصِرًا ؕ اِنَّ اللّٰهَ لَذُوْ فَضْلٍ عَلَى النَّاسِ وَلٰكِنَّ اَكْثَرَ
النَّاسِ لَا يَشْكُرُوْنَ ﴿٦١﴾

**अल्लाहतआलाने तुमच्याकरीता रात्र बनविली की तुम्ही तीत विश्रांती घ्यावी.[८] आणि दिवसाला दाखविणारा बनवून दिले;[९] नि:संशय अल्लाहतआला लोकांवर फारच कृपावंत आहे. परंतु बहुतेक लोक आभार मानीत नाहीत[१०] ६१**

ذٰلِكُمُ اللّٰهُ رَبُّكُمْ خَالِقُ كُلِّ شَيْءٍ ۘ لَآ اِلٰهَ اِلَّا هُوَ ۫
فَاَنّٰى تُؤْفَكُوْنَ ﴿٦٢﴾

**हाच तर अल्लाह आहे, तुम्हासर्वांचा पाळणारा पोसणारा, प्रत्येक वस्तुचा निर्माता; त्याच्या वाचून अन्य कोणी उपास्य नाही. मग कशा प्रकारे तुम्ही बहकत चालले जात आहात[११] ६२**

५) अर्थ आहे, ज्याप्रमाणे डोळस आणि आंधळा समान नाहीत. अशाच प्रकारे ईमानवाला आणि काफिर आणि सुकृत्ये करणारा आणि कुकृत्ये करणारा समान नाहीत. किंबहुना कयामतच्या दिवशी यांच्यामध्ये जो मोठा फरक असेल, तो बिल्कुल स्पष्ट होऊन, पुढे येऊन जाईल.

६) मागील महावाक्यामध्ये जेव्हा अल्लाहतआलाने कयामत घडून येण्याची चर्चा केली, तेव्हा आता या महावाक्यामध्ये असे मार्गदर्शन दिले जात आहे, ज्याचा अंगिकार करून मनुष्य, परलोकांत सुदैवी होऊ शकेल. या महावाक्यांत दुआने, बहुतेक भाष्यकारांनी, उपासना अभिप्रेत धरली आहे. म्हणजे फक्त एका अल्लाहची उपासना करा. जसे की हदीसमध्ये सुद्धा दुआला उपासना किंबहुना उपासनेचा मेंदू ठरविण्यांत आले आहे. 'अद्‌दुआ हुवल इबादतु' आणि 'अद्‌दुआऊ मुख्खुल इबादा' (मुसनद अहमद) याशिवाय याच्यानंतर 'यस्तकबिरुन अन् इबादती' च्या शब्दांवरून पण स्पष्ट आहे की, अभिप्रेत उपासना आहे. काही म्हणतात की दुआने अभिप्रेत दुआच आहे. म्हणजे अल्लाहजवळ नफा प्राप्त करणे आणि संकटांना दूर करण्याची मागणी करणे. कारण की दुआचा (धर्म) शास्त्रीय आणि वास्तविक अर्थ मागणी करण्याचा आहे. दुसऱ्या अर्थात याचा उपयोग भावार्थ अभिप्रेत धरला आहे. याशिवाय दुआ पण आपल्या खऱ्या अर्थाच्या अनुषंगाने आणि चर्चित हदीशीनुसार पण उपासनाच आहे. कारण की, सबबीच्या पलीकडील पद्धतीने कोणाजवळ काही वस्तू मागणे आणि त्याच्याजवळ मागणी करणे, ही त्याची उपासनाच आहे. (फत्हुल कदीर) अर्थ दोन्ही स्वरूपांत एकच आहे की, अल्लाहशिवाय अन्य कोणाला इच्छा पूर्ती करण्यासाठी आणि मदतीसाठी बोलावणे योग्य नाही. कारण की अशा प्रकारे सबबींच्या पलिकडील पद्धतीने कोणाला इच्छापूर्ती करण्यासाठी बोलाविणे, त्याची उपासना करणे आहे. आणि अल्लाहशिवाय कोणाची उपासना करणे योग्य नाही.

७) हा, अल्लाहच्या उपासनेला नाकारणे किंवा त्यापासून तोंड फिरविणे किंवा याच्यात दुसऱ्यांना पण सामिल करणाऱ्यांचा परिणाम आहे. अंध:कारमय बनविले की, जीवनाचा कारभार ठप्प होऊन जावा. आणि लोकांनी सुखाने झोपूशकावे.

८) म्हणजे रात्रीला.

९) म्हणजे प्रकाशित बनविले की, रोजी रोटीसाठी मेहनत करता यावी आणि चालण्या फिरण्यांत त्रास न व्हावा.

१०) अल्लाहच्या देणग्यांचा आणि त्याला मान्य न करण्याचा. एक तर कुफ्र आणि इनकारामुळे, जशी की काफिरांची रीत आहे. किंवा दात्याच्या आवश्यक आभार मानण्यापासून बेपर्वाई आणि स्तुती मुळे जशी की अडाणी लोकांची पद्धत आहे.

११) म्हणजे तर मग तुम्ही त्याच्या उपासनेपासून का पळ काढताआणि त्याच्या एकेश्वरवादाकडून का फिरतात आणि का ऐट दाखविता?

كَذَٰلِكَ يُؤْفَكُ الَّذِينَ كَانُوا بِآيَاتِ اللَّهِ يَجْحَدُونَ ﴿٦٣﴾

अशाच प्रकारे ते लोक पण बहकत चालले जात होते, जे अल्लाहच्या निशाण्यांना नाकारत होते. ६३

اللَّهُ الَّذِي جَعَلَ لَكُمُ الْأَرْضَ قَرَارًا وَالسَّمَاءَ بِنَاءً وَصَوَّرَكُمْ فَأَحْسَنَ صُوَرَكُمْ وَرَزَقَكُم مِّنَ الطَّيِّبَاتِ ۚ ذَٰلِكُمُ اللَّهُ رَبُّكُمْ ۖ فَتَبَارَكَ اللَّهُ رَبُّ الْعَالَمِينَ ﴿٦٤﴾

अल्लाहच आहे, [१] ज्याने तुमच्याकरीता पृथ्वीस रहाण्याची जागा [२] आणि आकाशाला छत बनविले. [३] आणि तुमचे चेहरे बनविले आणि फार सुरेख बनविले. [४] आणि उत्तम उत्तम वस्तू तुम्हास खावयास दिल्या. [५] हाच अल्लाह तुमचा पालनकर्ता आहे. फारच बरकतीवाला अल्लाह आहे, सकल जगांचा पालनकर्ता. ६४

هُوَ الْحَيُّ لَا إِلَٰهَ إِلَّا هُوَ فَادْعُوهُ مُخْلِصِينَ لَهُ الدِّينَ ۗ الْحَمْدُ لِلَّهِ رَبِّ الْعَالَمِينَ ﴿٦٥﴾

तो जिवंत आहे, ज्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. तर तुम्ही निव्वळ त्याचीच उपासना करीत त्याला [६] बोलवा. सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे जो सकल जगांचा पालनकर्ता आहे. ६५

قُلْ إِنِّي نُهِيتُ أَنْ أَعْبُدَ الَّذِينَ تَدْعُونَ مِن دُونِ اللَّهِ لَمَّا جَاءَنِيَ الْبَيِّنَاتُ مِن رَّبِّي وَأُمِرْتُ أَنْ أُسْلِمَ لِرَبِّ الْعَالَمِينَ ﴿٦٦﴾

आपण सांगून टाका की, मला त्यांच्या उपासनेपासून मना करण्यात आले आहे, ज्यांना तुम्ही अल्लाहशिवाय बोलावितात; [७] या आधारावर की, मजजवळ माझ्या पालनकर्त्याची प्रमाणे पोहचून चुकली आहेत. मला हा हुकूम देण्यात आला आहे की, मी सकल जगांच्या पालकर्त्याच्या आज्ञांकीत होऊन जावे. [८] ६६

هُوَ الَّذِي خَلَقَكُم مِّن تُرَابٍ ثُمَّ مِن نُّطْفَةٍ ثُمَّ مِنْ عَلَقَةٍ ثُمَّ يُخْرِجُكُمْ طِفْلًا ثُمَّ لِتَبْلُغُوا أَشُدَّكُمْ ثُمَّ لِتَكُونُوا شُيُوخًا ۚ وَمِنكُم مَّن يُتَوَفَّىٰ مِن قَبْلُ ۖ وَلِتَبْلُغُوا أَجَلًا مُّسَمًّى وَلَعَلَّكُمْ تَعْقِلُونَ ﴿٦٧﴾

तो तोच आहे, ज्याने तुम्हास मातीपासून मग विर्यबिंदुतून [९] मग रक्ताच्या गोळ्यापासून निर्माण केले. मग तुम्हास मूल बनवून काढतो. मग (तुम्हास वाढवितो की) तुम्ही आपल्या पूर्ण सामर्थ्याला पोहचून जावे. मग मोठे वृद्ध होऊन [१०] जावे. तुमच्यातून काही याच्यापूर्वीच मरून जातात. [११] (तो तुम्हास सोडून देतो) की तुम्ही ठराविक वेळेपर्यंत पोहचून जावे. [१२] आणि हे की तुम्ही चिंतन मनन करावे. [१३] ६७

هُوَ الَّذِي يُحْيِي وَيُمِيتُ ۖ فَإِذَا قَضَىٰ أَمْرًا فَإِنَّمَا يَقُولُ لَهُ كُن فَيَكُونُ ﴿٦٨﴾

तोच आहे जो जिववितो आणि मारून टाकतो. [१४] मग जेव्हा तो कोणी काम करण्याचे निश्चित करतो, तर त्याला फक्त हे म्हणतो की, होऊन जा! तर ते होऊन जाते. [१५] ६८

८ १२

أَلَمْ تَرَ إِلَى الَّذِينَ يُجَادِلُونَ فِي آيَاتِ اللَّهِ أَنَّىٰ يُصْرَفُونَ ﴿٦٩﴾

काय तू त्यांना पाहिलेस, जे अल्लाहच्या निशाण्यात झगडतात. [१६] ते कोठे पालटून चालले जातात? [१७] ६९

الَّذِينَ كَذَّبُوا بِالْكِتَابِ وَبِمَا أَرْسَلْنَا بِهِ رُسُلَنَا ۖ فَسَوْفَ يَعْلَمُونَ ﴿٧٠﴾

ज्या लोकांनी पुस्तकाला खोटे ठरवले; आणि त्यांना सुद्धा जे आम्ही आपल्या पैगंबरांबरोबर पाठविलीत. त्यांना लवकरच स्थिती माहित होऊन जाईल. ७०

إِذِ الْأَغْلَالُ فِي أَعْنَاقِهِمْ وَالسَّلَاسِلُ يُسْحَبُونَ ﴿٧١﴾

जेव्हा की, त्यांच्या मानेत मानखोडे असतील; आणि साखळदंड असतील; फरफटत नेले जातील. [१८] ७१

فِي الْحَمِيمِ ثُمَّ فِي النَّارِ يُسْجَرُونَ ﴿٧٢﴾

उकळत्या पाण्यात; आणि मग नरकाग्नीच्या आगीत जाळले जातील [१९] ७२

१) जिवंत करणे आणि मारणे, त्याच्या अधिकारात आहे. तो एका विर्यबिंदुला निरनिराळ्या अवस्थांतून पार करून एका जिवंत माणसाच्या रुपात ढाळून देतो. आणि मग एका निश्चित वेळेनंतर या जिवंत माणसाला मारून मृत्यूच्या खाईत झोपवून देतो.

२) त्याच्या सामर्थ्याची ही स्थिती आहे की त्याचा शब्द 'कुन्' (होऊन जा!) ने ती वस्तू अस्तित्वांत येऊन जाते, जिचा तो इरादा करील.

३) नकार किंवा खोटे म्हणण्याकरीता किंवा त्याच्या खंडनार्थ.

४) म्हणजे निशाण्या जाहीर होणे आणि सत्य उघड झाल्यावर सुद्धा ते कोण्याही प्रकारे सत्याला मानीत नाहीत. हे

आश्चर्य प्रकट करणे आहे.
५) हे ते चित्रण आहे, जे नरकाग्नीत, खोटे ठरवणाऱ्यांचे होईल.
६) म्हणजे सर्व काही करणारा आणि देणाराही तोच आहे. दुसरा कोणी न बनविण्यात शामील आहे न अधिकारात. तर मग उपासनेला पात्र पण फक्त एक अल्लाहच आहे. दुसरा कोणी याच्यात शामील होऊ शकत नाही. मदत आणि सहाय्य त्याच्याचकडे मागा की तोच सर्वांच्या फिर्यादी आणि विनविण्या, ऐकण्यास समर्थ आहे. दुसरा कोणी पण सबबीच्या पलीकडे पद्धतीने कोणाचे बोलणे ऐकण्यास समर्थच नाही. जर अशी गोष्ट आहे तर दुसरे संकट निवारण आणि इच्छापूर्ती कशाप्रकारे करू शकतात .
७) मग जरी त्या दगडाच्या मूर्ती असो, पैगंबर किंवा सत्पुरूष असोत. आणि थडग्यात पुरलेल्या व्यक्ती असोत. मदतीसाठी कोणाचा धावा करू नका. त्यांच्या नांवाने नवस करू नका. त्यांच्या नावाचे जप करू नका. त्यांचे भय बाळगू नका. आणि त्याच्याशी आशा आकांक्षा बाळगू नका. कारण की हे सर्व उपासनेचे प्रकार आहेत; जो फक्त एका अल्लाहचा हक्क आहे.
८) ही तीच बुद्धी प्रामाण्ये आहेत ज्याच्याने अल्लाहचा एकेश्वरवाद, म्हणजे अल्लाहच एकटा उपास्य आणि पालनकर्ता होणे सिद्ध होते. जे कुरआनात जागोजागी वर्णन करण्यात आले आहेत. इस्लामचा अर्थ आहे आज्ञापालनासाठी झुकून जाणे; आज्ञापालनात शिर नमविणे म्हणजे अल्लाहच्या आदेशाच्या समोर मी झुकून जावे. त्यांच्याशी शिरजोरी करू नये. पुढे, पुन्हा काही एकेश्वरवादाची प्रमाणे सांगण्यात येत आहेत.
९) म्हणजे तुमचे वडील आदमला मातीपासून बनविले. जे यांच्या सकल संततीला मातीपासून होण्याला कारणीभूत आहे. मग याच्यानंतर मनुष्याचा वंश सतत चालावा आणि बाकी आणि सुरक्षित रहाण्यासाठी, मनुष्याच्या निर्मितीला विर्यबिंदुशी संबंधीत करून दिले. आता प्रत्येक मनुष्य या विर्यबिंदुपासून निर्माण होतो जे बापाच्या पाठीतून निघून आईच्या गर्भाशयात जाऊन स्थिरावतो. ह.ईसा عليه السلام शिवाय की त्यांचा जन्म, एक चमत्कार म्हणून, बापाशिवाय झाला. जसे की, कुरआन करीमच्या वर्णन केलेल्या तपशीलाने स्पष्ट आहे. आणि ज्यावर उम्मते मुस्लीमाचे एकमत आहे.
१०) म्हणजे या सर्व अवस्था आणि स्थित्यंतरे पार पाडणारा अल्लाहच आहे; ज्याचा कोणी पातीदार नाही.
११) म्हणजे आईच्या गर्भाशयांत वेगवेळ्या स्थित्यंतरापासून पार होऊन, बाहेर येण्याच्या पूर्वीच, आईच्या पोटांत काही बाल्यावस्थेत, काही तारूण्यात आणि काही वृद्धावस्थेच्या पूर्वी, प्रौढावस्थेत मरण पावतात.
१२) म्हणजे अल्लाहतआला हे यासाठी करतो की, ज्याचे जेवढे आयुष्य अल्लाहतआलाने लिहून ठेवले आहे, त्याने त्याला पोहचून जावे. आणि एवढे जीवन जगात घालवून घ्यावे.
१३) म्हणजे जेव्हा तुम्ही या स्थित्यंतरे आणि अवस्थांवर मनन कराल की, विर्यबिंदुपासून भृण, मग मांसाचा गोळा, मग मूल, मग तारूण्य, प्रौढावस्था आणि वृद्धत्व. तेव्हा तुम्ही जाणून घ्याल की तुमचा पालनकर्ता पण एकच आहे, आणि तुमचा उपास्य पण एकच. त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही. याशिवाय हे पण समजून घ्याल की, जो अल्लाह हे सर्व काही करणारा आहे, त्याच्यासाठी कयामतच्या दिवशी मनुष्यांना दुसऱ्यादा जिवंत करून देणे पण कठीण नाही आणि तो नक्कीच सर्वांना जिवंत करील.
१४) मुजाहिद आणि मुकातील चे म्हणणे आहे की, यांच्याने नरकाग्नीची आग भडकविली जाईल; म्हणजे हे लोक तिचे इंधन बनतील.
१५) पुढे देणग्यांचे काही प्रकार वर्णन केले जात आहे. कारण की अल्लाहच्या सामर्थ्याची कमाल पण प्रकट व्हावी. आणि त्याचे दुसऱ्याला शामील केल्याशिवाय उपास्य होणे सुद्धा.
१६) ज्याच्यात तुम्ही रहातात, चालतात, फिरतात, कारभार करतात, आणि जीवन घालवतात. मग सरशेवटी मृत्युला कवटाळून कयामत पर्यंत इच्यांतच झोपेत जातात.
१७) म्हणजे कायम आणि स्थिर रहाणारे छत, जर त्याच्या पडण्याचे भय असते, तर कोणी मनुष्य सुखाने झोपू शकला नसता. तसेच कोणालाही जीवनातला कारभार करणे शक्य झाले नसते.
१८) जेवढे पण जमिनीच्या पृष्टभागावर प्राणी आहेत, त्या सर्वांत तुम्हा मनुष्याला सुंदर चेहऱ्याचा आणि परिपूर्ण आणि योग्य अवयववाला बनविला.
१९) म्हणजे नाना प्रकारची खाद्यान्ने तुमच्यासाठी प्राप्य केलीत. जी स्वादिष्ट पण आहेत. आणि शक्तीदायक सुद्धा.

ثُمَّ قِيلَ لَهُمْ أَيْنَ مَا كُنتُمْ تُشْرِكُونَ ﴿٧٣﴾

नंतर त्यांना विचारण्यात येईल की, ज्यांना तुम्ही सरकतदार करीत होता, ते कोठे आहेत? (७३)

مِن دُونِ اللَّهِ ۖ قَالُوا ضَلُّوا عَنَّا بَل لَّمْ نَكُن نَّدْعُوا مِن قَبْلُ شَيْئًا ۚ كَذَٰلِكَ يُضِلُّ اللَّهُ الْكَافِرِينَ ﴿٧٤﴾

जे अल्लाहच्या शिवाय होते, (१) ते म्हणतील की ते तर आमच्यापासून नाहिसे झाले. (२) किंबहुना आम्ही तर याच्यापूर्वी कोणालाही बोलावितच नव्हतो. (३) अल्लाहतआला अशाच प्रकारे काफिरांना मार्गभ्रष्ट करून टाकतो. (४) (७४)

ذَٰلِكُم بِمَا كُنتُمْ تَفْرَحُونَ فِي الْأَرْضِ بِغَيْرِ الْحَقِّ وَبِمَا كُنتُمْ تَمْرَحُونَ ﴿٧٥﴾

हा मोबदला आहे त्या गोष्टीचा जो तुम्ही पृथ्वीत नाहक अहंकार करीत होते; आणि (उगाच) ऐट मिरवीत फिरत होता. (५) (७५)

ادْخُلُوا أَبْوَابَ جَهَنَّمَ خَالِدِينَ فِيهَا ۖ فَبِئْسَ مَثْوَى الْمُتَكَبِّرِينَ ﴿٧٦﴾

नरकाग्नीत नेहमी राहण्यासाठी, त्याच्या दरवाजातून, दाखल व्हा. किती वाईट आणि अपमानित जागा आहे, गर्व करणाऱ्यांची (६) (७६)

فَاصْبِرْ إِنَّ وَعْدَ اللَّهِ حَقٌّ ۚ فَإِمَّا نُرِيَنَّكَ بَعْضَ الَّذِي نَعِدُهُمْ أَوْ نَتَوَفَّيَنَّكَ فَإِلَيْنَا يُرْجَعُونَ ﴿٧٧﴾

तर आपण सहन करा, अल्लाहचे वचन नि:संशय सत्य आहे. (७) त्यांना आम्ही जे वायदे देऊन ठेविले आहेत, त्यांच्यातून काही आम्ही आपणास दाखवू; (८) किंवा असेच आम्ही आपणास उचलून घेऊ, त्यांचे परतून येणे तर आमच्याच कडे आहे. (९) (७७)

وَلَقَدْ أَرْسَلْنَا رُسُلًا مِّن قَبْلِكَ مِنْهُم مَّن قَصَصْنَا عَلَيْكَ وَمِنْهُم مَّن لَّمْ نَقْصُصْ عَلَيْكَ ۗ وَمَا كَانَ لِرَسُولٍ أَن يَأْتِيَ بِآيَةٍ إِلَّا بِإِذْنِ اللَّهِ ۚ فَإِذَا جَاءَ أَمْرُ اللَّهِ قُضِيَ بِالْحَقِّ وَخَسِرَ هُنَالِكَ الْمُبْطِلُونَ ﴿٧٨﴾

आणि आम्ही आपल्या पूर्वीसुद्धा पुष्कळसे पैगंबर पाठवून चुकलो आहोत. ज्यांच्यातून काहीचे वृत्तांत आम्ही आपणास ऐकवून चुकलो आहोत. आणि यांच्यातून काहींच्या गोष्टी आम्ही आपणास ऐकविल्याच (१०) नाहीत. आणि कोण्या पैगंबरात हे सामर्थ्य नव्हते की, अल्लाहच्या परवानगी शिवाय कोणी चमत्कार आणून दाखवावा. (११) मग जेव्हाअल्लाहचा हुकूम येईल, (१२) न्यायाने फैसला करून दिला जाईल. (१३) आणि यावेळी जे लोक असत्त्यावर होते तेच तोट्यांत राहतील. (७८)

اللَّهُ الَّذِي جَعَلَ لَكُمُ الْأَنْعَامَ لِتَرْكَبُوا مِنْهَا وَمِنْهَا تَأْكُلُونَ ﴿٧٩﴾

अल्लाह तो आहे, ज्याने तुमच्याकरीता चतुष्पाद निर्माण केलेत. (१४) ज्यांतून काहींवर तुम्ही स्वार होता आणि काहींना तुम्ही खातात. (१५) (७९)

وَلَكُمْ فِيهَا مَنَافِعُ وَلِتَبْلُغُوا عَلَيْهَا حَاجَةً فِي صُدُورِكُمْ وَعَلَيْهَا وَعَلَى الْفُلْكِ تُحْمَلُونَ ﴿٨٠﴾

आणखी पण तुमच्या करीता त्यांच्यात पुष्कळसे फायदे आहेत. (१६) आणि आपल्या अंत:करणात लपलेल्या इच्छांना, त्यांच्यावर स्वारी करून तुम्ही प्राप्त करतात. आणि या चतुष्पादांवर आणि गलबतांवर स्वार केले जातात. (१७) (८०)

१) काय ते आज तुमची मदत करूशकतात?

२) म्हणजे ठाऊक नाही, कोठे चालले गेले आहेत; ते आमची मदत काय करतील?

३) मान्य केल्यानंतर, मग त्यांच्या उपासनेलाच नाकारून टाकतील. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''अल्लाह शपथ! आम्ही तर कोणाला पातीदार ठरवीतच नव्हतो.'' (सू.अन्आम - २३) काही म्हणतात की, हे मूर्तींचे अस्तित्व आणि त्यांच्या उपासनेला नाकारणे नव्हे! किंबहुना या गोष्टीला मान्य करणे आहे की त्यांची उपासना निरर्थक होती कारण की, तेथे त्यांच्यावर स्पष्ट होऊन जाईल की ते अशा वस्तुंची उपासना करीत राहिले, ज्या ऐकू शकत नव्हत्या आणि न पाहूंशकत होत्या. आणि न नुकसान पोहचवूशकत होत्या न नफा (फत्हुल कदीर) आणि त्याचा दुसरा अर्थ स्पष्ट आहे की, आणि तो हा की, ते शिर्कचा एकदम इनकारच करतील.

४) म्हणजे या खोटे ठरवणाऱ्याच्या प्रमाणे, अल्लाहतआला काफिरांनासुद्धा मार्गभ्रष्ट करतो. अर्थ हा आहे की, खोटे म्हणणे आणि कुफ्र, या अशा गोष्टी आहेत की, ज्यामुळे मनुष्यांची अंत:करणे काळी आणि त्यांना जंग लागून जातो. आणि मग ते नेहमीकरीता सत्य मान्य करण्याच्या सुबुद्धीपासून वंचित होऊन जातात.

५) म्हणजे तुमचे हे बहकणे, या गोष्टीचा परिणाम आहे की, तुम्ही कुफ्र आणि खोटे म्हणणे आणि कुकृत्यात एवढे पुढे गेले होते की, यावर तुम्ही आनंदित होत होता आणि ऐट दाखवित होता. ऐट दाखविण्यात आणखी आनंद जाहीर करणे आहे. जो गर्वासारखा आहे.

६) हे नरकाग्नीवर तैनांत केलेल देवदूत, नर्कवासियांना म्हणतील.

७) की आम्ही काफिरांवर सूड उगवू हा वायदा लवकरपण पूर्ण होऊ शकतो. म्हणजे जगांतच आम्ही त्यांची पकड करून घ्यावी. किंवा अल्लाहच्या मर्जीप्रमाणे उशीरपण होऊ शकतो. म्हणजे कयामतच्या दिवशी आम्ही त्यांना शिक्षा द्यावी. तथापि, ही गोष्ट नक्की आहे की, हे अल्लाहच्या पकडीपासून वांचून कोठे जाऊ शकत नाहीत.

८) म्हणजे आपल्या जीवनांत, त्यांना शिक्षेत गर्क करून टाकू! आणि झालेही असेच; अल्लाहने काफिरांवर सूड उगवून मुसलमानांचे डोळे गार केलेत. बद्रच्या युद्धांत ७० काफिर ठार मारले गेलेत. ८ हिजरीमध्ये, मक्केवर विजय झाला. आणि मग नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या शुभ जीवनांतच पूर्ण अरब भूशीर मुसलमानांच्या अधिपत्याखाली येऊन गेले.

९) म्हणजे जर काफिर ऐहिक पकड आणि शिक्षेपासून वाचून जरी गेलेत, तर शेवटी जातील कोठे? शेवटी माझ्याच जवळ येतील. जेथे त्यांच्यासाठी अति कडक शिक्षा तयार आहे.

१०) आणि हे संख्येमध्ये त्यांच्या तुलनेत, ज्यांचे वृत्तांत वर्णन केले गेले आहेत, फार जास्त आहेत, यासाठी की, कुरआन करीममध्ये तर फक्त २५ पैगंबरांचा उल्लेख, आणि त्यांच्या समाजांची स्थिती वर्णन करण्यात आली आहे.

११) आयतने अभिप्रेत येथे, चमत्कार आणि कायद्याच्या विरूद्ध घडणारी घटना आहे जी पैगंबराच्या सत्त्यतेवर प्रमाण व्हावी. काफिर लोक पैगंबरांजवळ मागणी करीत राहिले की, आम्हास अमुक अमुक गोष्ट दाखवा. जसे स्वत: नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमजवळ मक्केच्या काफिरांनी कित्येक गोष्टींची मागणी केली. ज्याचा तपशील सू.बनी इस्राईल ९०-९३ मध्ये आढळून येतो. अल्लाहतआला सांगत आहे की, कोण्या पैगंबराच्या अधिकारात हे नव्हते की, त्यांनी आपल्या लोकांच्या मागणीवर त्यांना काही चमत्कार सादर करून दाखवावा. हे फक्त आमच्या अधिकारात होते. काही पैगंबरांना तर सुरवातीलाच चमत्कार देऊन देण्यात आले होते. काही समाजांना त्यांच्या मागणीवर चमत्कार दाखविण्यात आला. आणि काहींना मागणी असूनसुद्धा दाखविण्यात आला नाही. आमच्या मर्जीनुसार याचा फैसला होत असे. कोण्या पैगंबराच्या हातांत हा अधिकार नव्हता की, तो जेव्हा इच्छील, तेव्हा चमत्कार सादर करून दाखवील. याच्याने त्या लोकांचे स्पष्ट खंडन होते, जे काही अवलीयाकडे या गोष्टी निर्देशित करतात; की ते जेव्हा इच्छीत नैसर्गिक कायद्याच्या विरूद्ध कामे (करामात) जाहीर करून टाकत असत. जसे शेख अब्दुल कादिर जीलानी رحمۃ اللہ علیہ साठी वर्णन करतात. या सर्व मनघडत गप्पा गोष्टी आहेत; जेव्हा अल्लाहने पैगंबरांना हा अधिकार दिला नाही, ज्याला आपले सत्यत्व सिद्ध करण्यासाठी, याची आवश्यकता पण होती; तर कोण्या वलीला हा अधिकार कसा बरे मिळावा? जेव्हाकी विशेषत्वाने वलीला याची आवश्यकता पण नाही. कारण की पैगंबराच्या पैगंबरीवर ईमान आणणे आवश्यक असते. म्हणून चमत्कार त्यांची आवश्यकता होती. परंतु अल्लाहचे प्रयोजन आणि बुद्धीमत्ता याला इच्छित नव्हती. म्हणून हे सामर्थ्य कोण्या पैगंबराला देण्यात आले नाही. वलीच्या विलायतवर ईमान ठेवणे आवश्यक नाही. म्हणून त्यांना चमत्कार आणि करामतची आवश्यकताच नाही. त्यांना अल्लाहतआला हा अधिकार, आवश्यकतेशिवाय का प्रदान करूशकतो?

१२) म्हणजे इहलोकांत किंवा परलोकांत, जेव्हा त्यांच्या शिक्षेची निश्चित वेळ येऊन जाईल.

१३) म्हणजे त्यांच्या दर्म्यान न्यायाने फैसला करून टाकला जाईल. सत्यवादींना मुक्ती आणि मिथ्यावादींना शिक्षा.

१४) अल्लाहतआला आपल्या बेसुमार देणग्यांपैकी काही देणग्यांची चर्चा करीत आहे. चतुष्पादाने अभिप्रेत उंट, गाय, बकरी आणि मेंढी आहे. हे नर मादी मिळून आठ आहेत. जसे की, सू.अन्आम १४३-१४४ मध्ये आहे.

१५) हे स्वारीच्या कामात पण येतात; यांचे दूध पण पितात. (जसे बकरी, गाय आणि उंटिणचे दूध) यांचे मांस माणसाचे अत्यंत प्रिय खाद्य आहे. आणि ओझे वहाण्याचे काम पण यांच्याकडून घेण्यात येते.

१६) जसे या सर्वांच्या लोकर आणि केसांपासून आणि त्यांच्या कातडीपासून कित्येक वस्तू बनविल्या जातात. यांच्या दुधांपासून तूप, लोणी, पनीर वगैरे पण बनते.

१७) याच्याने अभिप्रेत मुले आणि स्त्रियांआहेत; ज्यांना पालखीसह उंट वगैरे वर बसविण्यात येते.

وَ يُرِيْكُمْ اٰيٰتِهٖ ۖ فَاَيَّ اٰيٰتِ اللّٰهِ تُنْكِرُوْنَ ﴿٨١﴾

**अल्लाह तुम्हास आपल्या निशाण्या दाखवीत चालला आहे.** [१] **तर तुम्ही अल्लाहच्या कोण कोणत्या निशाण्यांस नाकारात जाल** [२] (८१)

اَفَلَمْ يَسِيْرُوْا فِي الْاَرْضِ فَيَنْظُرُوْا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ ؕ كَانُوْٓا اَكْثَرَ مِنْهُمْ وَ اَشَدَّ قُوَّةً وَّ اٰثَارًا فِي الْاَرْضِ فَمَآ اَغْنٰى عَنْهُمْ مَّا كَانُوْا يَكْسِبُوْنَ ﴿٨٢﴾

**काय त्यांनी जमिनीत चालून फिरून आपल्या पूर्वीच्यांचा परिणाम पाहिला नाही?** [३] **जे यांच्यापेक्षा संख्येत जास्त होते. आणि बळात फारच जबरदस्त; आणि जमिनीमध्ये पुष्कळशी स्मारके सोडून दिली होती.** [४] **त्यांनी केलेल्या कामांनी, त्यांना काहीही फायदा पोहोचविला नाही.** [५] (८२)

فَلَمَّا جَآءَتْهُمْ رُسُلُهُمْ بِالْبَيِّنٰتِ فَرِحُوْا بِمَا عِنْدَهُمْ مِّنَ الْعِلْمِ وَحَاقَ بِهِمْ مَّا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ﴿٨٣﴾

**तर जेव्हाकधी त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर खुल्या निशाण्या घेऊन आलेत, तर हे आपल्या जवळ, असलेल्या ज्ञानावर ऐट दाखवू लागले;** [६] **सरशेवटी ज्या गोष्टींचा ते उपहास करीत होते, तीच त्यांच्यावर उलटून पडली.** (८३)

فَلَمَّا رَاَوْا بَاْسَنَا قَالُوْٓا اٰمَنَّا بِاللّٰهِ وَحْدَهٗ وَكَفَرْنَا بِمَا كُنَّا بِهٖ مُشْرِكِيْنَ ﴿٨٤﴾

**आमची शिक्षा पाहताच म्हणू लागले की, एका अल्लाहवर आम्ही ईमान आणले, आणि ज्यांना ज्यांना आम्ही त्याचा सरकतदार ठरवीत होतो, आम्ही त्यास मानीत नाही.** (८४)

فَلَمْ يَكُ يَنْفَعُهُمْ اِيْمَانُهُمْ لَمَّا رَاَوْا بَاْسَنَا ؕ سُنَّتَ اللّٰهِ الَّتِيْ قَدْ خَلَتْ فِيْ عِبَادِهٖ ۚ وَخَسِرَ هُنَالِكَ الْكٰفِرُوْنَ ﴿٨٥﴾

**परंतु आमची शिक्षा पाहिल्यानंतर ईमान आणणे, त्यांना फायदेकारक झाले नाही. अल्लाहने आपली रीत हीच निश्चित करून ठेवली आहे, जी त्याच्या सेवकांत बरोबर चालत आली आहे.** [७] **आणि या ठिकाणी काफिर वाईट आणि तोट्यांत राहिले.** [८] (८५)

१) जे याचे सामर्थ्य आणि एकेश्वरवादावर प्रमाण्य आहेत. आणि या निशाण्या विश्वातच नाही, तुमच्या (स्वत:च्या) जिवांत देखील आहेत.

२) म्हणजे ही इतकी स्पष्ट सर्वसाधारण, आणि मुबलक आहेत. ज्याला कोणी नाकारणारा नाकारू शकत नाही. हे प्रश्नवाचक विचारणे नाकारण्यासाठी आहे.

३) म्हणजे ज्या समूहांनी अल्लाहचे आज्ञाभंजन केले, आणि पैगंबरांना खोटे ठरवले, हे त्यांच्या वस्तीचे चिन्ह आणि खंडर तर पहा! जे त्यांच्या इलाख्यातच आहेत. की, त्यांचा काय परिणाम झाला?

४) म्हणजे इमारती, कारखाने आणि शेतीच्या स्वरूपात त्यांचे भग्नावशेष स्पष्ट करतात की, ते कला कौशल्याच्या क्षेत्रांत पण तुमच्या पेक्षा ते वरचढ होते.

५) 'फमा अग्ना' मध्ये 'मा' प्रश्नवाचक होऊ शकतो. आणि नकार देणारा सुद्धा. नकार देण्याचा भावार्थ तर भाषांतराने स्पष्ट आहे. प्रश्नवाचक च्या अनुषंगाने अर्थ होईल, यांना काय फायदा पोहचविला? अर्थ तोच आहे की, यांची कमाई त्यांच्या काही कामा येऊ शकली नाही.

६) 'इल्म' ने अभिप्रेत त्यांनी स्वत:च तयार केलेल्या भ्रामक कल्पना, आक्षेप आणि निरर्थक दावे आहेत. त्यांना ज्ञानाने उपहास म्हणून संबोधिले आहे. कारण की ते त्यांना बौद्धिक प्रमाणे समजत होते. त्यांच्या कल्पनेप्रमाणे असे म्हटले. अर्थ हा आहे की, अल्लाह व रसूलच्या गोष्टीच्या मुकाबल्यात हे आपल्या भ्रामक कल्पना आणि आक्षेप यावर ऐट दाखवित आणि गर्व करीत राहिले. किंवा ज्ञानाने अभिप्रेत ऐहिक गोष्टीचे ज्ञान आहे; हे अल्लाहचे आणि कर्तव्याच्या (फर्ज) मुकाबल्यात, त्यांनाच प्राधान्य देत राहिले.

७) म्हणजे अल्लाहची ही रीत चालत आली आहे की, शिक्षा पाहिल्यानंतर तौबा करणे आणि ईमान आणणे मान्य नाही. हा विषय कुरआन करीममध्ये अनेक ठिकाणी सांगण्यात आला आहे.

८) म्हणजे शिक्षा पाहिल्यानंतर, त्यांच्यावर स्पष्ट होऊन गेले की, आता तोटा आणि नष्ट होण्याशिवाय, आमच्या दैवांत काही नाही.

महावाक्ये ५४ | (४१)सू. हा मीम सज्द: | रुकूअ ६

آيَاتُهَا ٥٤ (٤١) سُوْرَةُ حٰمٓ السَّجدة مَكِّيَّةٌ (٦١) رُكُوْعَاتُهَا ٦

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ ○

حٰمٓ ۚ ①

हा मीम ①

تَنۡزِيۡلٌ مِّنَ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ ۚ ②

परम दयाळूआणि कृपाळूकडून उतारले गेले आहे. ②

كِتٰبٌ فُصِّلَتۡ اٰيٰتُهٗ قُرۡاٰنًا عَرَبِيًّا لِّقَوۡمٍ يَّعۡلَمُوۡنَ ۙ ③

पुस्तक आहे, ज्याच्या महावाक्यांचा स्पष्ट तपशील केला गेला आहे. (४)
कुरआन अरबी भाषेत (५) आहे. त्या लोकांसाठी जे जाणतात. (६) ③

بَشِيۡرًا وَّنَذِيۡرًا ۚ فَاَعۡرَضَ اَكۡثَرُهُمۡ فَهُمۡ لَا يَسۡمَعُوۡنَ ④

शुभवार्ता देणारे आणि भयसूचना देणारे आहे. (७) तरी सुद्धा यांच्या
बहुतेक लोकांनी तोंड फिरवून घेतले आणि ते ऐकतच नाही. (८) ④

✪ या अध्यायाचे दुसरे नाव फुस्सिलत आहे. याच्या अवतरणाच्या कारणाच्या रिवायतीमध्ये सांगण्यात आले आहे की, एकदा कुरैशच्या सरदारांनी आपसात सल्ला मसलत केली की, मुहम्मद (सल्लल्लाहु व अलैहि व सल्लम) च्या अनुयायांच्या संख्येमध्ये दिवसेंदिवस वाढच होत आहे. आम्हास याची रोकथाम करण्यासाठी जरूर काही तरी करावयास पाहिजे. म्हणून त्यांनी आपल्यातून सर्वात मोठा संभाषण चतुर व सुंदर वक्ता उतबा बिन रबीया – ची निवड केली. कारण की त्याने आपण ﷺ शी बातचित करावी. म्हणून तो आपल्या सेवेत गेला, आणि आपल्यावर अरबांमध्ये मतभेद आणि फूट टाकण्याचा आरोप करून, मागणी केली की, या नव्या आवाहनापासून आपला उद्देश्य, धनसंपत्ती प्राप्त करणे आहे तर ती आम्ही आपणास जमा करून देतो. पुढारीपण व हुकूमत पाहिजे, तर आम्ही आपणास आपला लिडर आणि सरदार मानून घेतो. कोण्या सुंदर स्त्रीशी लग्न करू इच्छित असाल, तर एक नाही अशा दहा स्त्रियांची व्यवस्था आम्ही करून देतो. आणि जर आपल्यावर 'आसेब' चा परिणाम झालेला आहे ज्यामुळे, आपण आमच्या उपास्यांना वाईट म्हणतात, तर आम्ही आपल्या खर्चाने तुमचा इलाज करून देतो. आपण ﷺ नी याच्या सर्व गोष्टी ऐकून, या अध्यायाचे पठण, त्याच्यासमोर केले. ज्याच्याने त्याच्यावर फारच परिणाम झाला. त्याने परत जाऊन कुरैशच्या सरदारांना सांगितले की, तो जी गोष्ट सादर करीत आहे, ती न जादू आणि ज्योतिष्य आहे न काव्य आहे. त्याचा उद्देश्य, आपण ﷺ च्या आवाहनावर कुरैशच्या सरदारांना चिंतन आणि मनन करण्याचे आमंत्रण देणे होते. परंतु ते चिंतन आणि मनन काय करते? उलटा उतबा वर आरोप केला की, तुझ्यावर सुद्धा त्याच्या जादूचा परिणाम झालेला आहे. या रिवायती वेगवेगळ्या पद्धतीने इतिहासकारांनी आणि भाष्यकारांनी वर्णन केलेल्या आहेत. इमाम इब्ने कसीर आणि इमाम शौकानीने सुद्धा त्या नोंदविल्या आहेत. इमान शौकानी म्हणतात, ''या रिवायती, या गोष्टीवर प्रमाण्य करतात की, कुरैशचे संम्मेलन नक्कीच झाले. त्यांनी उतबाला बातचित करण्यासाठी पाठविले; आणि नबी सल्लल्लाहु व अलैहि व सल्लमनी या अध्यायाच्या सुरवातीचा भाग त्याला ऐकविला.''

४) म्हणजे काय हलाल आहे आणि काय हराम आहे? किंवा आज्ञापालन आणि पाप काय आहे? किंवा पुण्याची कामे कोणती आहेत आणि प्रताडना मिळणारी कामे कोणती आहेत?

५) हा वर्तमान काळ आहे. म्हणजे याचे शब्द अरबी आहेत. ज्यांचा अर्थ तपशिलासह आणि स्पष्ट आहे.

६) म्हणजे जी अरबी भाषा, त्याचे अर्थ भावार्थ, आणि त्याच्या भेदांना आणि उघड गोष्टींना जाणते.

७) ईमान आणि सुकृत्ये असणाऱ्यांना, यश आणि स्वर्गाची खुषखबर ऐकविणारा, आणि मुशरिकीन आणि खोटे म्हणणाऱ्यांना, अग्नीच्या शिक्षेपासून भिवविणारा.

८) म्हणजे चिंतन आणि मनन, आणि परिणामावर विचार करणे व समजणेच्या इराद्याने ऐकत नाही, की ज्यामुळे त्यांचा फायदा व्हावा. म्हणूनच त्यांचे संख्या बाहुल्य हिदायतपासून वंचित आहे.

وَ قَالُوْا قُلُوْبُنَا فِيْٓ اَكِنَّةٍ مِّمَّا تَدْعُوْنَآ اِلَيْهِ وَ فِيْٓ اٰذَانِنَا وَقْرٌ وَّمِنْۢ بَيْنِنَا وَ بَيْنِكَ حِجَابٌ فَاعْمَلْ اِنَّنَا عٰمِلُوْنَ ۝٥

**आणि त्यांनी म्हटले की तू ज्याकडे आम्हास बोलावित आहे, त्यापासून आमची अंत:करणे परद्यांत [१] आहेत. आणि आमच्या कानांत बधिरत्व [२] आहे. आणि आमच्यांत आणि तुझ्यात एक पर्दा आहे. बरे तर तूआताआपले काम करीत रहा, आम्ही सुद्धा खचित्‌च काम करणारे आहोत. [३] ५**

قُلْ اِنَّمَآ اَنَا بَشَرٌ مِّثْلُكُمْ يُوْحٰٓى اِلَيَّ اَنَّمَآ اِلٰهُكُمْ اِلٰهٌ وَّاحِدٌ فَاسْتَقِيْمُوْٓا اِلَيْهِ وَ اسْتَغْفِرُوْهُ وَوَيْلٌ لِّلْمُشْرِكِيْنَ ۝٦

**आपण सांगून द्या की, मी तर तुमच्याच सारखा मनुष्य आहे माझ्यावर वह्य अवतरीत केले जाते की तुम्हासर्वांचा उपास्य एक अल्लाहच आहे. [४] तर तुम्ही त्याच्याकडे तोंड करून चालले जा. आणि त्याच्या जवळ आपल्या अपराधांची क्षमा मागा. आणि या मुशरिकांसाठी (फारच) बरबादी आहे. ६**

الَّذِيْنَ لَا يُؤْتُوْنَ الزَّكٰوةَ وَهُمْ بِالْاٰخِرَةِ هُمْ كٰفِرُوْنَ ۝٧

**जे जकात देत नाहीत. [५] आणि परलोकाचे नाकारणारेच रहातात. ७**

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَهُمْ اَجْرٌ غَيْرُ مَمْنُوْنٍ ۝٨

**नि:संशय ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कामे केलीत, त्यांच्याकरीता न संपणारे प्रतिफल आहे. [६] ८**

قُلْ اَئِنَّكُمْ لَتَكْفُرُوْنَ بِالَّذِيْ خَلَقَ الْاَرْضَ فِيْ يَوْمَيْنِ وَتَجْعَلُوْنَ لَهٗٓ اَنْدَادًا ذٰلِكَ رَبُّ الْعٰلَمِيْنَ ۝٩

**आपण सांगून द्या की, काय तुम्ही त्याचा (अल्लाहचा) इनकार करतात, आणि तुम्ही त्याचे जोडीदार ठरवतात, ज्याने दोन दिवसात पृथ्वी निर्माण करून टाकली. [७] सकल जगांचा पालनकर्ता तोच आहे. ९**

وَجَعَلَ فِيْهَا رَوَاسِيَ مِنْ فَوْقِهَا وَبٰرَكَ فِيْهَا وَقَدَّرَ فِيْهَآ اَقْوَاتَهَا فِيْٓ اَرْبَعَةِ اَيَّامٍ سَوَآءً لِّلسَّآئِلِيْنَ ۝١٠

**त्याने पृथ्वीवर तिच्यामधूनच पर्वत निर्माण करून दिले; [८] आणि तिच्यांत बरकत ठेवून दिली. [९] आणि तिच्यात (राहणाऱ्यांच्या) खाद्यांची सोय पण तिच्यांतच करून दिली, [१०] (फक्त) चार दिवसांतच [११] गरजवंतांसाठी एक समान. [१२] १०**

ثُمَّ اسْتَوٰٓى اِلَى السَّمَآءِ وَهِيَ دُخَانٌ فَقَالَ لَهَا وَلِلْاَرْضِ ائْتِيَا طَوْعًا اَوْ كَرْهًا قَالَتَآ اَتَيْنَا طَآئِعِيْنَ ۝١١

**मग आकाशाकडे वळला; आणि ते धुके (सारखे) होते. मग त्याला आणि पृथ्वीला हुकूम दिला की, तुम्ही उभयता खुषीने या अथवा बळजबरीने [१] दोघांनी विनंती केली आम्ही खुषीने हजर आहोत ११**

१) 'अकिन्ना', किनान चे अनेकवचन आहे. म्हणजे पर्दा. म्हणजे आमची अंत:करणे या गोष्टींपासून पर्द्यात आहेत की, आम्ही तुझ्या एकेश्वरवाद आणि ईमानाच्या आवाहनाला समजू शकावे.

२) 'वक्र' चा खरा अर्थ, ओझ्याचा आहे. येथे अभिप्रेत बहिरेबणा आहे. जो सत्त्याच्या ऐकण्याला अडथळा आणित होता.

३) म्हणजे आमच्या आणि तुझ्या दर्म्यान, असा पर्दा आडवा आहे की तू जे म्हणतोस ते ऐकू शकत नाही. आणि जे करतो, त्याला आम्ही पाहू शकत नाही. म्हणून तूआम्हांस आमच्या स्थितीवर सोडून दे; आणि आम्ही तुला तुझ्या स्थितीवर सोडून द्यावे. तू आमच्या धर्मावर अंमलबजावणी करीत नाही. आम्ही तुझ्या धर्मावर अंमलबजावणी करूशकत नाही.

४) म्हणजे माझ्या आणि तुमच्या दर्म्यान काही फरक नाही, अल्लाहच्या वह्याशिवाय. मग हा दुरावा आणि पर्दा का? याशिवाय मी जे एकेश्वरवादाचे आमंत्रण सादर करीत आहे, ते पण असे नाही की बुद्धीला पटू न शकावे. मग यापासून तोंड फिरविणे का?

५) हा अध्याय मक्की आहे. जकात हिजरतच्या दुसऱ्या वर्षी फर्ज झाली. म्हणून याच्याने अभिप्रेत एक तर दानधर्म आहे, ज्याचा हुकूम मुसलमानांना मक्केत पण दिला जात राहिला होता. ज्याप्रमाणे प्रथम फक्त सकाळ संध्याकाळच्या नमाजीचा हुकूम होता. मग हिजरतच्या दिड वर्षेपूर्वी, इसराच्या रात्रीला, पांच फर्ज नमाजीचा हुकूम झाला. किंवा मग

जकातने अभिप्रेत येथे कलमए शहादत आहे; ज्याच्याने माणसाचा जीव शिर्कच्या बरबटण्यापासून पवित्र होऊन जातो. (इब्ने कसीर)

६) 'अजरून गय्रुरु ममनून' चा अर्थ आहे म्हणजे न संपणारे प्रतिफळ.

७) कुरआन मजीदमध्ये अनेक ठिकाणी उल्लेख केला गेला आहे की, ''अल्लाहने आकाश आणि पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले'' येथे याचा काही तपशील वर्णन करण्यात आला आहे. पृथ्वीला दोन दिवसात बनविले. याच्याने अभिप्रेत आहे यौमुल अहद (रविवार) आणि यौमुल इसनैन (सोमवार) सू.नाजिआत मध्ये सांगण्यात आले आहे, ''वल् अर्ज बाद जालिका दहाहा'' ज्याने उघड माहित होते की, पृथ्वीला आकाशा नंतर बनविण्यांत आले आहे. जेव्हा की येथे पृथ्वीच्या निर्मितीचा उल्लेख, आकाशाच्या निर्मितीच्या पूर्वी केला गेला आहे. ह.इब्ने अब्बास ﷺ नी याचा खुलासा अशाप्रकारे केला आहे की, निर्मिती वेगळी गोष्ट आहे आणि 'दहा:' (आंथरणे किंवा पसरविणे) वेगळी गोष्ट. जमिनीची निर्मिती, आकाशाच्या पूर्वी झालेली आहे. जसे की येथे सुद्धां सांगण्यांत आले आहे. आणि 'दहा:' (आंथरण्याचे) चे काम, आकाशाच्या निर्मितीनंतर केले गेले. आणि 'दहा:' चा अर्थ आहे की, पृथ्वीला रहाण्या योग्य बनविण्यासाठी, तिच्यांत पाण्याचे साठे ठेवण्यात आले. तिला उत्पादनाच्या आवश्यकतेचे गोडाऊन बनविण्यात आले. (अखरजा मिनहा माअ हा व मर्आहा) तिच्यात पर्वत, टेकड्या आणि खनिजे ठेवण्यात आले. हे काम आकाशाच्या निर्मितीनंतर, दुसऱ्या दोन दिवसांत करण्यांत आले. अशा प्रकारे पृथ्वी आणि तिच्याशी संबंधितांची निर्मिती, पूर्ण चार दिवसांत संपूर्ण झाली. (स.बुखारी तफसीर सू.हा मीम सजदा:)

८) म्हणजे पर्वतांना पृथ्वीतूनच निर्माण करून, त्यांना इत्त्यावर गाडून देण्यात आले की, पृथ्वीने इकडे तिकडे डोलू नये.

९) हा इशारा आहे, पाण्याची मुबलकता, नाना प्रकारचे खाद्यान्न, खनिजे, आणि दुसऱ्या याच प्रकारच्या वस्तुंकडे. ही जमिनीची बरकत आहे. भरपूर मालाचे नावच बरकत आहे.

१०) 'अक्वात' 'कूत' (खाद्यान्न) चे अनेकवचन आहे. म्हणजे पृथ्वीवर वसणाऱ्या सर्व जीव सृष्टीचे खाद्य हिच्यात ठेवून देण्यात आले आहे. किंवा त्याचा बंदोबस्त करून दिला आहे. आणि अल्लाहच्या या प्रयुक्ती किंवा बंदोबस्ताची शृंखला इतकी विस्तृत आहे की, कोणी मुख याचे वर्णन करू शकत नाही; कोणी लेखणी त्याला लिहू शकत नाही. आणि कोणी कॅलक्युलेटर, त्याला मोजू शकत नाही. काहींनी याचा अर्थ हा सांगितला आहे की, प्रत्येक जमिनीच्या भागात, काही अशा वस्तू निर्माण करून दिल्या, ज्या जमिनीच्या दुसऱ्या भागांत निर्माण होऊ शकत नाही. कारण की प्रत्येक इलाख्याचे हे विशिष्ट उत्पन्न, त्या त्या इलाख्यांचा व्यापार आणि रोजीचे साधन बनून जावे. म्हणून हा भावार्थपण आपल्याजागी बरोबर आणि बिलकुल वास्तविक आहे.

११) म्हणजे निर्मितीच्या पूर्वी दोन दिवस, आणि 'दहा:' चे दोन दिवस, सर्व दिवस मिळून हे चार दिवस झालेत. ज्यांच्यात हे सर्व काम पूर्णत्वाला पोहचले.

१२) 'सवाअन्' चा अर्थ आहे, ठिक चार दिवसात; म्हणजे विचारणाऱ्यांना सांगून द्या की निर्मिती आणि पसरविण्याचे हे काम ठिक चार दिवसात झाले.

१) हे येणे कशा प्रकारचे होते? याची स्थिती सांगितली जाऊं शकत नाही. हे उभयताअल्लाहच्या जवळ आले, ज्याप्रमाणे त्याने इच्छिले. काहींनी याचा भावार्थ घेतला आहे की माझ्या हुकूमाचे आज्ञापालन करा, ते म्हणाले ठीक आहे. आम्ही हजर आहोत. मग अल्लाहने आकाशाला हुकूम दिला, माझे सूर्य, चंद्र आणि तारे काढ. आणि पृथ्वीला म्हणाला, आपल्या नद्या वाहवून दे, आणि आपली फळे काढून दे. (इब्ने कसीर) किंवा भावार्थ आहे की, तुम्ही उभयंता अस्तित्वात येऊन जा!

**मग दोन दिवसात सात आकाशे बनवून दिलीत. आणि प्रत्येक आकाशांत त्याच्या आवश्यकतेनुसार 'वह्य' पाठवून दिले.[१] आणि आम्ही जगाच्या आकाशाला ताऱ्यांनी सुशोभित केले आणि संरक्षण केले.[२] ही व्यवस्था प्रबळ आणि सर्वज्ञानी अल्लाहची आहे. (१२)**

فَقَضٰىهُنَّ سَبْعَ سَمٰوَاتٍ فِيْ يَوْمَيْنِ وَاَوْحٰى
فِيْ كُلِّ سَمَآءٍ اَمْرَهَا ۭ وَزَيَّنَّا السَّمَآءَ الدُّنْيَا
بِمَصَابِيْحَ ۖ وَحِفْظًا ۭ ذٰلِكَ تَقْدِيْرُ الْعَزِيْزِ
الْعَلِيْمِ ۝١٢

**आतासुद्धा जर हे तोंड फिरवतील, तर सांगून द्या की, मी तुम्हास त्या (आकाशी शिक्षे) पासून भिववीत आहे जी 'आद' आणि 'समूद' च्या (विजेच्या कडकडाट) शिक्षेसारखी होईल. (१३)**

فَاِنْ اَعْرَضُوْا فَقُلْ اَنْذَرْتُكُمْ صٰعِقَةً مِّثْلَ
صٰعِقَةِ عَادٍ وَّثَمُوْدَ ۝١٣

**यांच्याजवळ यांच्या पुढून मागून पैगंबर आलेत की, तुम्ही अल्लाहच्या शिवाय कोणाची उपासना करू नका. तर त्यांनी उत्तर दिले की, जर आमचा पालनकर्ता इच्छिता, तर देवदूतांना पाठविता. आम्ही तर तुमच्या पैगंबरीला बिल्कुल मानत नाही.[३] (१४)**

اِذْ جَآءَتْهُمُ الرُّسُلُ مِنْۢ بَيْنِ اَيْدِيْهِمْ وَمِنْ خَلْفِهِمْ
اَلَّا تَعْبُدُوْٓا اِلَّا اللّٰهَ ۭ قَالُوْا لَوْ شَآءَ رَبُّنَا لَاَنْزَلَ
مَلٰۗىِٕكَةً فَاِنَّا بِمَآ اُرْسِلْتُمْ بِهٖ كٰفِرُوْنَ ۝١٤

**आता आदने तर मुलुखात हकनाक शिरजोरी सुरू करून दिली. आणि म्हणू लागले की, आमच्यापेक्षा शक्तीमान कोण आहे?[४] काय त्यांना हे दिसले नाही की, ज्याने त्यांना निर्माण केले आहे, तो यांच्यापेक्षा ही (जास्त) शक्तीमान आहे.[५] ते (शेवटपर्यंत) आमच्या निशाण्यांना[६] नाकारतच राहिले. (१५)**

فَاَمَّا عَادٌ فَاسْتَكْبَرُوْا فِي الْاَرْضِ بِغَيْرِ الْحَقِّ وَقَالُوْا
مَنْ اَشَدُّ مِنَّا قُوَّةً ۭ اَوَلَمْ يَرَوْا اَنَّ اللّٰهَ الَّذِيْ خَلَقَهُمْ
هُوَ اَشَدُّ مِنْهُمْ قُوَّةً ۭ وَكَانُوْا بِاٰيٰتِنَا يَجْحَدُوْنَ ۝١٥

**सरशेवटी आम्ही त्यांच्यावर एक सोसाट्याचा वारा,[७] मनहूस (दुर्भाग्य) दिवसात[८] पाठवून दिला की त्यांना जित्या जिवी फजितीच्या शिक्षेची गोडी चाखवून द्यावी. आणि (लक्षांत ठेवा की), परलोकातील शिक्षा, याच्यापेक्षा जास्त फजितीची आहे. त्यांना काही मदत दिली जाणार नाही. (१६)**

فَاَرْسَلْنَا عَلَيْهِمْ رِيْحًا صَرْصَرًا فِيْٓ اَيَّامٍ نَّحِسَاتٍ
لِّنُذِيْقَهُمْ عَذَابَ الْخِزْيِ فِي الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۭ
وَلَعَذَابُ الْاٰخِرَةِ اَخْزٰى وَهُمْ لَا يُنْصَرُوْنَ ۝١٦

१) म्हणजे स्वत: आकाशाला किंवा त्याच्यात रहाणाऱ्या देवदूतांना विशिष्ट कामांचा आणि अल्लाहचे नामस्मरण करण्याला नियमित करून दिले.

२) म्हणजे शैतानापासून संरक्षण. जसा की दुसऱ्या ठिकाणी खुलासा आहे. ताऱ्यांचा एक तिसरा उद्देश्य, दुसऱ्या ठिकाणी 'इहतदाउन' (मार्ग जाणून घेणे) पण सांगण्यांत आला आहे. (सू.नह्ल-१६)

३) म्हणजे, कारण की, तुम्ही आमच्या प्रमाणेच मनुष्य आहात, म्हणून आम्ही तुम्हास पैगंबर मानू शकत नाही. अल्लाहतआलाला पैगंबर पाठवायचाच होता, तर देवदूतांना पाठविता, न की मनुष्याला.

४) अशा बोलण्याने त्यांचा उद्देश्य हा होता की, ते शिक्षेला रोकण्याला समर्थ आहेत. कारण की ते फार उंच, आणि सशक्त होते. हे ते त्या वेळी, म्हणाले जेव्हा त्यांचे पैगंबर ह.हूद عليه السلام नी त्यांना धमकावण्या आणि तंबीकरीतां, अल्लाहच्या शिक्षेपासून भिवविले.

५) म्हणजे काय ते अल्लाहपेक्षासुद्धा जास्त शक्तीमान आहेत, ज्याने त्यांना निर्माण केले. आणि त्यांना शक्तीप्रदान केली. काय त्यांना बनविल्यानंतर, त्याची आपली शक्ती आणि सामर्थ्य संपून गेले आहे? हे विचारणे, निर्भत्सना आणि कानउघाडणी करीताआहे.

६) त्या चमत्कारांचा ,जे आम्ही आमच्या पैगंबरांना दिले होते; किंवा प्रमाणांचा जे पैगंबरांबरोबर अवतीर्ण केले होते किंवा त्या नैसर्गिक निशाण्या ज्या ब्रंम्हाडात पसरलेल्या आणि विखुरलेल्या आहेत.

७) 'सर् सर्' 'सुर्रदून' (आवाज) पासून आहे, म्हणजे वारा ज्याच्यांत भारी गर्जना होती. म्हणजे फारच सोसाट्याचा वारा. ज्याच्यात आवाज पण असतो. काही म्हणतात हे 'सर्र' पासून आहे. ज्याचा अर्थ 'बरद' (थंडी) चा आहे. म्हणजे असा थंडगार बर्फासारखा वारा जो आगीसारखा पोळून टाकतो. इमाम इब्ने कसीर म्हणतात, तो वारा या सर्व गोष्टींनी परिपूर्ण होता.

८) 'नहिसात' चे भाषांतर, काहींनी लगातार, एका मागून एक असा केला आहे. कारण की हा वारा सात रात्री आणि आठ दिवस सतत वाहत राहिला. काहींनी भयंकर काहींनी धूळ मिश्रीत, आणि काहींनी दुर्दैववाला केले आहे. शेवटच्या भाषांतराचा अर्थ हा होईल, की, हे दिवस, ज्यात यांच्यावर सोसाट्याच्या वाऱ्याचे तुफान चालूं राहिले, त्यांच्यासाठी शापित सिद्ध झाले. हे नाही की, सर्वच दिवस दुर्दैवी आहेत.

| | |
|---|---|
| **राहिले समूद तर आम्ही त्यांना पण मार्ग दाखून दिला.[१] तरी सुद्धा त्यांनी अंधपणाला हिदायतवर प्राधान्य[२] दिले. ज्यामुळे त्यांना निव्वळ अपमानाच्या आकाशी शिक्षेने, त्यांच्या (कु) कर्मामुळे येऊन गाठले[३] (१७)** | وَاَمَّا ثَمُوْدُ فَهَدَيْنٰهُمْ فَاسْتَحَبُّوا الْعَمٰى عَلَى الْهُدٰى فَاَخَذَتْهُمْ صٰعِقَةُ الْعَذَابِ الْهُوْنِ بِمَا كَانُوْا يَكْسِبُوْنَ ﴿١٧﴾ |
| **आणि (हां)! ईमानवाल्यांना, अल्लाहला भिणाऱ्यांना आम्ही अगदी बरोबर वाचवून घेतले. (१८)** | وَنَجَّيْنَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَكَانُوْا يَتَّقُوْنَ ﴿١٨﴾ |
| **आणि ज्या दिवशी[४] अल्लाहचे शत्रू, नरकाग्नीकडे आणले जातील, आणि त्या (सर्वांना) गोळा करून दिले जाईल.[५] (१९)** | وَيَوْمَ يُحْشَرُ اَعْدَآءُ اللّٰهِ اِلَى النَّارِ فَهُمْ يُوْزَعُوْنَ ﴿١٩﴾ |
| **येथ पावेतो की, जेव्हा बिलकुल नरकाग्नीच्या जवळ येऊन जातील, त्यांच्यावर त्यांचे कान आणि त्यांचे डोळे, आणि त्यांच्या त्वचा, त्यांच्या कर्मांची साक्ष देतील[६] (२०)** | حَتّٰٓى اِذَا مَا جَآءُوْهَا شَهِدَ عَلَيْهِمْ سَمْعُهُمْ وَاَبْصَارُهُمْ وَجُلُوْدُهُمْ بِمَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿٢٠﴾ |
| **हे आपल्या त्वचांना विचारतील की, तुम्ही आमच्या विरुद्ध साक्ष का दिली?[७] ते उत्तर देतील की, आम्हास त्या अल्लाहने बोलण्याची ताकद दिली, ज्याने प्रत्येक वस्तुंस बोलण्याची शक्ती दिली आहे. त्यानेच तुम्हाला पहिल्या वेळेस निर्माण केले; आणि त्याच्याचकडे तुम्ही सर्व पालटून जाल.[८] (२१)** | وَقَالُوْا لِجُلُوْدِهِمْ لِمَ شَهِدْتُّمْ عَلَيْنَا ۭ قَالُوْٓا اَنْطَقَنَا اللّٰهُ الَّذِيْٓ اَنْطَقَ كُلَّ شَيْءٍ وَّهُوَ خَلَقَكُمْ اَوَّلَ مَرَّةٍ وَّاِلَيْهِ تُرْجَعُوْنَ ﴿٢١﴾ |

१) म्हणजे त्यांना एकेश्वरवादाचे आवाहन केले; त्याची प्रमाणे त्यांच्या समोर स्पष्ट केलीत. आणि त्यांचे पैगंबर ह.सॉलेह عليه السلام च्या मार्फत त्यांच्यावर तर्क पूर्ण केला.

२) म्हणजे त्यांनी विरोध केला आणि खोटे ठरवले. येथपावेतो की त्या उंटीणीला सुद्धा मारून टाकले. जी चमत्कार म्हणून त्यांच्या इच्छेनुसार दगडाच्या शिळेतून प्रकट करण्यात आली होती. आणि पैगंबराच्या सत्य होण्याचे प्रमाण होती.

३) 'साइका' कडक शिक्षेला म्हणतात. यांच्यावर ही कडक शिक्षा, गडगडाट आणि भूकंपाच्या स्वरूपात आली, जिने त्यांना फजित आणि अपमानित करून नष्ट करून टाकले.

४) येथे 'उज्कुर' महजुफ आहे, तो वेळ आठवा जेव्हाअल्लाहच्या शत्रुंना नरकाग्नीचे देवदूत गोळा करतील. म्हणजे सुरवातीपासून शेवटपर्यंत शत्रुंना एकत्र गोळा केले जाईल.

५) ''यांना थांबवून थांबवून, सुरवातीचे आणि शेवटचे, यांना एकत्र गोळा केले जाईल.'' (फत्हुल कदीर) या शब्दाच्या आणखी खुलाशाकरीता पहा, सू.नमल आ.क्र.१७ चा समास

६) म्हणजे जेव्हा हे त्या गोष्टीचा इन्कार करतील की त्यांनी शिर्क केले, तेव्हा अल्लाहतआला त्यांच्या तोंडावर मोहोर लावून देईल. आणि त्यांचे अवयव बोलून साक्ष देतील की, हे अमुक अमुक काम करीत राहिले. मनुष्यामध्ये पांच ज्ञानेंद्रिये आहेत. येथे दोनचा उल्लेख आहे. तिसरा, त्वचेचा उल्लेख आहे. जी स्पर्श ज्ञानाचे किंवा (थंडी उष्णता) जाणून घेण्याचे साधन आहे. अशा प्रकारे ज्ञानेंद्रियाचे तीन प्रकार झाले. बाकी दोन ज्ञानेंद्रियांचा उल्लेख या साठी केला नाही की जोक (चाखणे) त्वचेने स्पर्श करण्यात (पण) दाखल आहे; कारण की, हे चाखणे तो पर्यंत शक्य नाही, जो पर्यंत त्या वस्तुला जिभेच्या त्वचेवर न ठेवण्यांत येईल. अशाचप्रकारे सुंघणे, त्यावेळेपर्यंत शक्य नाही, जो पर्यंत ती वस्तू नाकाच्या त्वचेवरून न जाईल. या अनुषंगाने 'जुलूद' च्या शब्दात तीन ज्ञानेंद्रिय येऊन जातात. (फत्हुल कदीर)

७) म्हणजे जेव्हा मुशरिकीन आणि काफिर पाहतील की, स्वत: त्यांचेच अवयव त्यांच्या विरुद्ध साक्ष देत आहेत तर त्यांना असे म्हणतील.

८) काहींच्या जवळ 'व हुव' ने अल्लाहची वाणी आहे. आणि काहींच्या जवळ मानवी त्वच्यांचा बोलण्याचा भाग आहे. या मानवी अवयवांची साक्ष देण्याचा उल्लेख, याच्यापूर्वी सू.नूर आ.२४, सू.यासीन आ.६५ मध्ये सुद्धा येऊन चुकला आहे. आणि सहीह हदीसींमध्ये सुद्धा त्याला वर्णन करण्यात आले आहे. उदाहरणार्थ जेव्हा अल्लाहच्या हुकूमाने मानवी अवयव बोलून सांगतील, तेव्हा मनुष्य म्हणेल, ''तुम्हासाठी गारद होणे आणि दुरी असो! मी तर तुमच्याचसाठी झगडत होतो आणि रदबदली करीत होतो'' (स.मुस्लिम, किताबुल जुहद) याच रिवायतमध्ये हे पण सांगण्यात आले आहे की, मनुष्य म्हणेल की मी आपल्या स्वत: शिवाय, कोणाची साक्ष मान्य करणार नाही. अल्लाहतआला फर्माविल, काय मी आणि माझे देवदूत किरामन कातिबीन साक्षी देण्यास पुरेसे नाहीत? मग त्याच्या तोंडावर मोहोर लावून देण्यात येईल. आणि मग त्याच्या अवयवयांना बोलण्याचा हुकूम देण्यात येईल. (हवाला वरीलप्रमाणे)

وَمَا كُنْتُمْ تَسْتَتِرُوْنَ اَنْ يَّشْهَدَ عَلَيْكُمْ سَمْعُكُمْ وَلَآ اَبْصَارُكُمْ وَلَا جُلُوْدُكُمْ وَلٰكِنْ ظَنَنْتُمْ اَنَّ اللّٰهَ لَا يَعْلَمُ كَثِيْرًا مِّمَّا تَعْمَلُوْنَ ﴿۲۲﴾

आणि तुम्ही (आपली कुकृत्ये) यामुळे गुप्त ठेवतच नव्हते की, तुमच्यावर तुमचे कान आणि तुमचे डोळे आणि तुमच्या त्वचा साक्ष देतील.[१] होय, तुम्ही असे समजत राहिला की, तुम्ही जे काही करीत आहात, याच्यातून पुष्कळशा कर्मांशी अल्लाह अजाण आहे.[२] (२२)

وَذٰلِكُمْ ظَنُّكُمُ الَّذِيْ ظَنَنْتُمْ بِرَبِّكُمْ اَرْدٰىكُمْ فَاَصْبَحْتُمْ مِّنَ الْخٰسِرِيْنَ ﴿۲۳﴾

तुमच्या याच भ्रामक कल्पनेने, जी तुम्ही आपल्या पालनकर्त्या विषयी करून ठेवली होती. तुम्हास गारद करून दिले.[३] आणि सरशेवटी तुम्ही हानी भोगणाऱ्यांपैकी होऊन गेलात (२३)

فَاِنْ يَّصْبِرُوْا فَالنَّارُ مَثْوًى لَّهُمْ ۚ وَاِنْ يَّسْتَعْتِبُوْا فَمَا هُمْ مِّنَ الْمُعْتَبِيْنَ ﴿۲۴﴾

आतातरी हे सहन करतील, तरी पण यांचे ठिकाण नरकाग्नीच आहे. आणि जर ते क्षमायाचनेचे इच्छुक होतील, तरीसुद्धा त्यांना क्षमा केली जाणार नाही[४] (२४)

وَقَيَّضْنَا لَهُمْ قُرَنَآءَ فَزَيَّنُوْا لَهُمْ مَّا بَيْنَ اَيْدِيْهِمْ وَمَا خَلْفَهُمْ وَحَقَّ عَلَيْهِمُ الْقَوْلُ فِيْٓ اُمَمٍ قَدْ خَلَتْ مِنْ قَبْلِهِمْ مِّنَ الْجِنِّ وَالْاِنْسِ ۚ اِنَّهُمْ كَانُوْا خٰسِرِيْنَ ﴿۲۵﴾ ع

आणि आम्ही त्यांचे काही साथी तैनात करून ठेवले होते; ज्यांनी त्यांची पुढील मागची कर्मे, त्यांच्या नजरेत सुशोभित करून दाखविली होती.[५] आणि यांच्या बाबतीत सुद्धाअल्लाहचे वचन त्या उम्मतींबरोबर पूर्ण झाले, ज्या यांच्यापूर्वी जिन्न आणि मनुष्यांच्या होऊन चुकल्या आहेत खचित्‌च ते हानी भोगणारे सिद्ध झाले. (२५)

१) याचा अर्थ आहे की, तुम्ही गुन्ह्यांचे काम करीत असतांना, लोकांपासून तर लपण्याचा, प्रयत्न करीत होते; परंतु या गोष्टीचे कोणतेही भय तुम्हास नव्हते की, तुमच्या विरूद्ध खुद्द तुमचे स्वत:चे अवयव पण साक्ष देतील की ज्यांच्यापासून लपण्याची आवश्यकता तुम्हाला जाणवली असती. याचे कारण त्यांचा, पुन्हा जिवंत होऊन उठणे आणि अल्लाहकडे पालटून जाण्याला नाकारणे, आणि यावर त्यांचा विश्वास नव्हता.

२) म्हणून तुम्ही अल्लाहच्या मर्यादा तोडण्याला आणि त्याचे आज्ञाभंजन करण्यात निडर होता.

३) म्हणजे तुमची ही चुकीची धारणा आणि भ्रामक कल्पनेने की, अल्लाहला आमच्या पुष्कळशा कर्मांचे ज्ञानच होत नाही, तुम्हांस गारद करून टाकले कारण की यामुळे तुम्ही प्रत्येक प्रकारचा गुनाह करण्यात धीट आणि निर्भय होऊन गेले होते. याच्या अवतरण्याच्या कारणांत एक रिवायत आहे. ह.अब्दुल्लाह बिन मसऊद ﵁ फर्मावितात की, खाना ए काबाजवळ दोन कुरशी आणि एक सकफी, किंवा दोन सकफी व एक कुरशी जमा झाले. मजबुत शरीर, कमी समज यांच्यातून एकाने म्हटले, ''काय तुम्ही असे समजता की, आमच्या गोष्टी अल्लाह ऐकतो?'' दुसऱ्याने म्हटले, ''आमच्या मोठ्याने बोललेल्या गोष्टी ऐकतो आणि हळूआवाजांत बोललेल्या गोष्टी ऐकत नाही.'' एका तिसऱ्याने सांगितले, ''जर तो आमच्या मोठ्याने बोललेल्या ऐकतो आहे, तर आमच्या गुप्त गोष्टीपण खचित्‌च ऐकत आहे. ज्यावर अल्लाहतआलाने महावाक्य ''व मा कुन्तुम तस्ततिरुन'' अवतीर्ण केले. (स.बुखारी तफसीर सु.हा मीम सज्दा:)

४) एक दुसरा अर्थ याचा हा केला गेला आहे की, जर ते अल्लाहची मनधरणी करू इच्छतील (प्रसन्नता प्राप्त करूइच्छतील) की, त्यांनी स्वर्गात चालले जावे; तर ही गोष्ट त्यांना कधीही प्राप्त होणार नाही. (अयसरुत तफासीर व फत्हुल कदीर) काहींनी याचा भावार्थ हा सांगितला आहे की, ते इहलोकांत दुसऱ्यादा पाठविण्याची आकांक्षा करतील. जी मंजुर होणार नाही. (इब्ने जरीर तब्री) अर्थ हा आहे की, यांचे कायमचे ठिकाण नरकाग्नी आहे. यावर सहन करतील (तरीसुद्धा दया केली जाणार नाही. जसे की जगात सहन करणाऱ्यांबद्दल दया वाटते) किंवा कोण्या वेगळ्या पद्धतीने तेथून निघण्याचा प्रयत्न करतील; परंतु त्यात पण त्यांना अपयशच येईल.

५) याच्याने अभिप्रेत, मनुष्ये आणि जिन्नात मधील ते शैतान आहेत, जे असत्त्यावर अडून राहणाऱ्यांबरोबर होऊन जातात. जे त्यांना कुफ्र आणि गुन्हे सुशोभित करुन दाखवितात. मग ते या बहकण्याच्या दलदलीत फसतच राहतात, येथपावेतो की त्यांचा मृत्यू होऊन जातो. आणि ते कायमच्या तोट्याला पात्र ठरतात.

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لَا تَسْمَعُوْا لِهٰذَا الْقُرْاٰنِ
وَالْغَوْا فِيْهِ لَعَلَّكُمْ تَغْلِبُوْنَ ﴿٢٦﴾

आणि काफिरांनी म्हटले या कुरआनाला ऐकूच [१] नका. (त्याच्या वाचनाच्या वेळी) निरर्थक गोष्टी करा [२] काय आश्चर्य! की कदाचित् तुम्ही सरशी होऊन जाल. [३] (२६)

فَلَنُذِيْقَنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا عَذَابًا شَدِيْدًا ۙ
وَّلَنَجْزِيَنَّهُمْ اَسْوَاَ الَّذِيْ كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿٢٧﴾

तर खचित्च आम्ही त्या काफिरांना कडक शिक्षेची गोडी चाखवू आणि त्यांच्या वाईटांत वाईट कर्मांचा मोबदला अवश्य (अवश्य) [४] देऊ (२७)

ذٰلِكَ جَزَآءُ اَعْدَآءِ اللّٰهِ النَّارُ ۚ لَهُمْ فِيْهَا دَارُ الْخُلْدِ ؕ
جَزَآءً ۢ بِمَا كَانُوْا بِاٰيٰتِنَا يَجْحَدُوْنَ ﴿٢٨﴾

अल्लाहच्या शत्रुंची शिक्षा हीच नरकाग्नीची आग आहे. ज्यात त्याचे नेहमीचे घर आहे. हा बदला आहे आमच्या निशाण्यांचा इनकार करण्याचा [५] (२८)

وَقَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا رَبَّنَآ اَرِنَا الَّذَيْنِ اَضَلّٰنَا
مِنَ الْجِنِّ وَالْاِنْسِ نَجْعَلْهُمَا تَحْتَ اَقْدَامِنَا لِيَكُوْنَا
مِنَ الْاَسْفَلِيْنَ ﴿٢٩﴾

आणि काफिर लोक म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हास जिन्नांत आणि माणसातील (ते दोन्ही लोक) दाखवून दे, ज्यांनी आम्हास बहकविले. [६] (कारण की,) आम्ही त्यांना आपल्या पायाखाली तुडवून टाकू जेणेकरून ते (नरकाग्नित) सर्वात खाली होऊन जावेत. [७] (२९)

اِنَّ الَّذِيْنَ قَالُوْا رَبُّنَا اللّٰهُ ثُمَّ اسْتَقَامُوْا تَتَنَزَّلُ
عَلَيْهِمُ الْمَلٰٓئِكَةُ اَلَّا تَخَافُوْا وَلَا تَحْزَنُوْا وَاَبْشِرُوْا
بِالْجَنَّةِ الَّتِيْ كُنْتُمْ تُوْعَدُوْنَ ﴿٣٠﴾

नि:संशय ज्या लोकांनी सांगितले की, आमचा पालनकर्ता अल्लाह आहे, [८] मग यावरच कायम राहिले, [९] त्यांच्याजवळ देवदूत (हे म्हणत येतात) [१०] की, तुम्ही काहीच भय बाळगू नका आणि दु:ख करू नका; [११] (किंबहुना) त्या स्वर्गाची खुषखबर ऐकून घ्या, ज्याचे तुम्हास वचन दिले गेले आहे. [१२] (३०)

نَحْنُ اَوْلِيٰٓؤُكُمْ فِي الْحَيٰوةِ الدُّنْيَا وَفِي الْاٰخِرَةِ ۚ
وَلَكُمْ فِيْهَا مَا تَشْتَهِيْٓ اَنْفُسُكُمْ وَلَكُمْ فِيْهَا مَا
تَدَّعُوْنَ ؕ ﴿٣١﴾

तुमच्या ऐहिक जीवनात सुद्धाआम्ही तुमचे मित्र होतो, आणि परलोकांत सुद्धा राहू, [१३] ज्या वस्तुला तुमचे मन इच्छील, आणि जे काही तुम्ही मागाल (स्वर्गांत सर्व उपस्थित) आहे. (३१)

نُزُلًا مِّنْ غَفُوْرٍ رَّحِيْمٍ ۧ ﴿٣٢﴾ ع ٤ ١٨

क्षमाकर्ता आणि दयाळूअल्लाहकडून हा तुमचा पाहुणचार आहे. (३२)

وَمَنْ اَحْسَنُ قَوْلًا مِّمَّنْ دَعَآ اِلَى اللّٰهِ وَعَمِلَ صَالِحًا
وَّقَالَ اِنَّنِيْ مِنَ الْمُسْلِمِيْنَ ﴿٣٣﴾

आणि याच्यापेक्षा जास्त चांगले बोलणे कोणाचे होऊ शकेल? जो अल्लाहकडे बोलावील आणि चांगली कामे करील आणि म्हणेल की, मी खचित्च मुसलमानांमधून आहे. [१४] (३३)

وَلَا تَسْتَوِي الْحَسَنَةُ وَلَا السَّيِّئَةُ ؕ اِدْفَعْ بِالَّتِيْ
هِيَ اَحْسَنُ فَاِذَا الَّذِيْ بَيْنَكَ وَبَيْنَهٗ عَدَاوَةٌ
كَاَنَّهٗ وَلِيٌّ حَمِيْمٌ ﴿٣٤﴾

पुण्य आणि पाप बरोबर होऊ शकत नाहीत. [१५] वाईटाचे भलाईने निर्सन करा. मग तुझा शत्रूअसा होऊन जाईल, जसा परम मित्र [१६] (३४)

وَمَا يُلَقّٰىهَآ اِلَّا الَّذِيْنَ صَبَرُوْا ۚ وَمَا يُلَقّٰىهَآ
اِلَّا ذُوْ حَظٍّ عَظِيْمٍ ﴿٣٥﴾

आणि ही गोष्ट त्यांच्याच दैवी येते, जे सहनशिलता पत्करतात. [१७] आणि त्याला मोठ्या भाग्यवंताशिवाय कोणीच प्राप्त करूशकत नाही. [१८] (३५)

१) हे त्यांनी आपसात एक दुसऱ्याला सांगितले. काहींनी 'ला तसमऊ' चा अर्थ केला आहे, त्याचे आज्ञापालन करू नका.

२) म्हणजे गोंधळ गडबड करा. टाळ्या शिट्ट्या वाजवा. ओरडून ओरडून गोष्ट करा. की, हजर असलेल्यांच्या कानांत कुरआनाचा आवाज पडू नये. आणि त्यांच्या अंत:करणांनी कुरआनाच्या शैलीने आणि खुबीने परिणाम न घ्यावा.

३) म्हणजे शक्य आहे, अशा प्रकारे गोंधळ केल्यामुळे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) कुरआनाचे पठणच करणार नाही. ज्याला ऐकून, लोकांवर परिणाम होतो.

४) म्हणजे त्यांच्या काही चांगल्या कामांची किंमत होणार नाही. उदाहरणार्थ पाहुण्यांचा आदर सन्मान, नातेवाईकांशी चांगली वर्तणूक, वागणूक, त्यांच्याशी संबंध जोडणे वगैरे. कारण की, ईमानाच्या दौलतीपासून ते वंचित् राहिले होते. तथापि वाईट कर्मांचा मोबदला त्यांना मिळेल, ज्यात कुरआन करीमपासून अडविण्याचा अपराध पण आहे.

५) आयतांनी अभिप्रेत, जसे की पूर्वीसुद्धा सांगून टाकण्यात आले आहे, ती स्पष्ट आणि खुली प्रमाणे आहेत, जी अल्लाहतआला पैगंबरांवर अवतीर्ण करतो. किंवा ते चमत्कार आहेत, जे त्यांना दिले जातात. किंवा ती नैसर्गिक

प्रमाणे आहेत जी ब्रम्हांडामध्ये म्हणजे विश्वांत आणि माणसाच्या स्वत:च्या जिवांमध्ये पसरलेली आहेत. काफिर या सर्वांना नाकारतात. ज्यामुळे ते ईमानाच्या दौलतीपासून वंचित राहतात.

६) याचा भावार्थ स्पष्ट आहे की, बहकविणारे फक्त शैतानच नसतात, मनुष्याची एक फार मोठी संख्या सुद्धा, शैतानाच्या परिणामाखाली लोकांना बहकविण्यात व्यस्त रहाते. तथापि काहींनी जिन्नने इबलीस, आणि मनुष्याने 'काबील' अभिप्रेत घेतला आहे. ज्याने मनुष्यांमध्ये सर्वांत प्रथम आपला भाऊ 'हाबील' ला ठार मारून, जुलूम आणि मोठ्या गुन्ह्याला सुरवात केली. आणि हदीसप्रमाणे कयामत पर्यंत होणारे अयोग्य ठार मारण्याच्या गुन्ह्याचा एक वांटा पण त्याला मिळत राहील. आमच्या विचारांत पहिला भावार्थ जास्त बरोबर आहे.

७) म्हणजे आपल्या पायांनी त्यांना तुडवावे. आणि अशाप्रकारे आम्ही त्यांना फार अपमानित आणि फजीत करावे. नर्कवासियांना आपल्या पुढाऱ्यावर जो राग येईल, त्याच्या समाधानासाठी ते असे म्हणतील; नाहीतर दोघेही अपराधी आहेत. आणि दोन्हीही समान नरकाग्नीची शिक्षा भोगतील. जसे दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''की सर्वांनाच दुप्पट (शिक्षा) आहे. परंतु तुम्हास ठाऊक नाही.'' (सू.अअ्राफ-३८). नर्कवासियांची चर्चा केल्यानंतर, अल्लाहतआला ईमानवाल्यांची चर्चा करीत आहे, जशी की सर्वसाधारणपणे कुरआनाची ही शैली आहे. कारण की भिवविण्याबरोबरच लालुच दाखविणे, आणि लालुच दाखविण्याबरोबरच भिवविण्यात सुद्धा यावे. जणू भिवविल्यानंतर शुभ सूचना.

८) म्हणजे एक अल्लाह ज्याचा कोणी सरकतदार नाही. पालनकर्तापण तोच आणि उपास्यपण तोच. असे नाही की पालकत्व तर मान्य केले जावे, परंतु उपास्यत्वांत दुसऱ्यांना पण शामील केले जात आहे.

९) म्हणजे कठीणांत कठीण परिस्थितीमध्ये, सुद्धा, ईमान आणि एकेश्वरवादावर कायम राहिलेत; याच्यापासून डळमळीत झाले नाहीत. काहींनी दृढ राहण्याचा अर्थ इखलास केला आहे. म्हणजे फक्त एक अल्लाहचीच उपासना आणि आज्ञापालन केले. ज्याप्रमाणे हदीसमध्ये सुद्धा येते एका मनुष्याने नबी करीम ﷺ ला म्हटले मला अशी गोष्ट सांगून द्यावी की, आपल्यानंतर कोणाला मला काही विचारण्याची आवश्यकता राहणार नाही. आपण ﷺ नी फर्माविले, 'म्हण मी अल्लाहवर ईमान आणले, आणि मग याच्यावर दृढ जमून रहा.'' (स.मुस्लिम)

१०) म्हणजे मृत्यूच्या वेळी, काही म्हणतात, देवदूत ही खुषखबर तीन ठिकाणी देतात. मृत्यूच्या वेळेस, आणि कबरेत, आणि कबरीतून दुसऱ्यादा उठण्याच्या वेळेस.

११) म्हणजे परलोकांत पुढे येणाऱ्या परिस्थितीचे भय, आणि जगांत जी संपत्ती आणि संतती सोडून आले आहे, त्याचे दु:ख करू नका.

१२) म्हणजे जगात ज्याचे वचन तुम्हास देण्यात आले होते.

१३) ही आणखी एक खुषखबर आहे. हा अल्लाहतआलाचा आदेश आहे. काहींच्या जवळ हे देवदूतांचे म्हणणे आहे. दोन्ही स्वरूपांत ही ईमानवाल्यांसाठी मोठी खुषखबर आहे.

१४) म्हणजे लोकांना अल्लाहकडे बोलविण्याबरोबरच स्वत:पण हिदायतला मान्य करणारा आणि धर्मावर कार्यरत, आणि अल्लाहचा आज्ञाधारक आहे.

१५) म्हणजे याच्यांत मोठाच फरक आहे.

१६) ही एक फारच महत्त्वाची चारित्र्य विषयक सूचना आहे. की वाईटाला चांगल्याने टाळा. म्हणजे वाईटाचा बदला चांगल्याने, जुलमाचा बदला क्षमेने, प्रकोपाचा सहनशिलतेने, अशिष्टपणाचा डोळेझांक करून, आणि नावडत्या गोष्टीचे उत्तर सहन करून आणि कनवाळूपणाने, दिले जावे. याचा परिणाम असा होईल की, तुमचा शत्रू तुमचा मित्र होऊन जाईल. दूर दूर रहाणारा जवळ होऊन जाईल; आणि रक्ताचा तान्हेला, तुम्हाला चाहणारा आणि तुमच्यावर जीव ओवाळून टाकणारा होऊन जाईल.

१७) म्हणजे वाईटाला चांगल्याने टाळण्याची खुबी, जरी फारच फायदेकारक आणि मोठे फळ देणारी आहे; परंतु यावर तेच अंमलबजावणी करू शकतील. जे सहनशील असतील आणि रागाला पिऊन जाणारे असतील. आणि नावडत्या गोष्टींना सहन करणारे.

१८) 'हज्जीन अजीम' (मोठे सदभाग्य) ने अभिप्रेत स्वर्ग आहे. म्हणजे चर्चित वैशिष्टये, त्याला प्राप्त होतात, जो फार मोठा भाग्यशाली असतो; म्हणजे स्वर्गवासी, ज्याच्यासाठी स्वर्गात जाणे लिहून दिले गेले असेल.

وَإِمَّا يَنزَغَنَّكَ مِنَ الشَّيْطَٰنِ نَزْغٌ فَاسْتَعِذْ بِاللَّهِ ۖ إِنَّهُ هُوَ السَّمِيعُ الْعَلِيمُ ﴿٣٦﴾

आणि जर शैतानाकडून कोणी वसवसा ध्वनित होईल तर अल्लाहजवळ आश्रय मागीत जा.[१] खचित्‌च तो खूप ऐकणारा जाणणारा आहे.[२] (३६)

وَمِنْ آيَٰتِهِ الَّيْلُ وَالنَّهَارُ وَالشَّمْسُ وَالْقَمَرُ ۚ لَا تَسْجُدُوا لِلشَّمْسِ وَلَا لِلْقَمَرِ وَاسْجُدُوا لِلَّهِ الَّذِي خَلَقَهُنَّ إِن كُنتُمْ إِيَّاهُ تَعْبُدُونَ ﴿٣٧﴾

आणि दिवस व रात्र आणि चंद्र व सूर्य सुद्धा, (त्याच्या) निशाण्यांमधून आहेत;[३] तुम्ही सूर्याला किंवा चंद्राला सजद: करू नका;[४] किंबहुना सजद: त्या अल्लाहच्या समोर करा, जो या सर्वांचा निर्माणकर्ता आहे, जर तुम्हास त्याचीच उपासना करावयाची आहे तर (३७)

فَإِنِ اسْتَكْبَرُوا فَالَّذِينَ عِندَ رَبِّكَ يُسَبِّحُونَ لَهُ بِالَّيْلِ وَالنَّهَارِ وَهُمْ لَا يَسْأَمُونَ ۩ ﴿٣٨﴾

मग जर हे अहंकार करतील तर, जे देवदूत तुमच्या पालनकर्त्याजवळ आहेत, ते तर रात्रंदिवस त्याचे पावित्र्य वर्णन करीत आहेत; आणि ते (केव्हाही) कंटाळत नाही. (३८)

وَمِنْ آيَٰتِهِ أَنَّكَ تَرَى الْأَرْضَ خَٰشِعَةً فَإِذَا أَنزَلْنَا عَلَيْهَا الْمَاءَ اهْتَزَّتْ وَرَبَتْ ۚ إِنَّ الَّذِي أَحْيَاهَا لَمُحْيِي الْمَوْتَىٰ ۚ إِنَّهُ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٣٩﴾

अल्लाहच्या या निशाण्यांमधून (हे पण) आहे की, तू जमिनीला नम्र आणि पडीत पडलेली पाहतोस.[५] मग जेव्हाआम्ही तिच्यावर पाणी वर्षवितो, तर ती टवटवीत होऊन व उमलून वर येऊ लागते.[६] ज्याने तिला जिवंत करून दिले, तो नक्कीच मृतांना सुद्धा जिवंत करून टाकील.[७] नि:संशय तो सर्व सामर्थ्यवान आहे. (३९)

إِنَّ الَّذِينَ يُلْحِدُونَ فِي آيَٰتِنَا لَا يَخْفَوْنَ عَلَيْنَا ۗ أَفَمَن يُلْقَىٰ فِي النَّارِ خَيْرٌ أَم مَّن يَأْتِي آمِنًا يَوْمَ الْقِيَٰمَةِ ۚ اعْمَلُوا مَا شِئْتُمْ ۖ إِنَّهُ بِمَا تَعْمَلُونَ بَصِيرٌ ﴿٤٠﴾

नि:संशय जे लोक आमच्या महावाक्यात वाकडेपणा आणतात,[८] ते काही आमच्याकडून लपलेले नाही;[९] (सांगा बरे)! जो आगीत टाकला जाईल, तो चांगला आहे की, तो जो, अभय आणि शांतीसह, कयामतच्या दिवशी येईल?[१०] तुम्ही जे हवे ते करीत चालले जा.[११] तुम्ही सर्व केले सवरलेले आहे, तो पाहणारा आहे. (४०)

إِنَّ الَّذِينَ كَفَرُوا بِالذِّكْرِ لَمَّا جَاءَهُمْ ۖ وَإِنَّهُ لَكِتَٰبٌ عَزِيزٌ ﴿٤١﴾

नि:संशय ज्या लोकांनी आपल्या जवळ कुरआन पोहचून गेले तरी सुद्धा, त्याला नाकारले (ते पण आमच्यापासून गुप्त नाही.)[१२] हे तर फार प्रतिष्ठीत पुस्तक आहे.[१३] (४१)

لَّا يَأْتِيهِ الْبَٰطِلُ مِن بَيْنِ يَدَيْهِ وَلَا مِنْ خَلْفِهِ ۖ تَنزِيلٌ مِّنْ حَكِيمٍ حَمِيدٍ ﴿٤٢﴾

ज्याच्याजवळ असत्य फटकूही शकत नाही. न त्याच्या पुढून,न त्याच्या मागून, हे बुद्धीमान आणि प्रशंसनीय (अल्लाहकडून)[१४] अवतरित झाले आहे. (४२)

مَّا يُقَالُ لَكَ إِلَّا مَا قَدْ قِيلَ لِلرُّسُلِ مِن قَبْلِكَ ۚ إِنَّ رَبَّكَ لَذُو مَغْفِرَةٍ وَذُو عِقَابٍ أَلِيمٍ ﴿٤٣﴾

आपल्यास तेच सांगण्यात येत आहे, जे आपल्या पूर्वीच्या पैगंबरांस सांगण्यात आले[१५] आहे. नि:संशय तुमचा पालनकर्ता क्षमाकर्ता[१६] आणि दु:खप्रत शिक्षावाला आहे.[१७] (४३)

१) म्हणजे शैतान, धर्मशास्त्रीय कामाकडून फिरवू इच्छेल, किंवा चांगल्या पद्धतीने वाईटाचे निर्सन करण्यात अडथळा आणेल, तर त्याच्या वाईटांपासून वाचण्यासाठी अल्लाहच्या मार्फत आश्रय मागा.

२) म्हणजे जो असा असेल, म्हणजे प्रत्येकाचे ऐकणारा आणि प्रत्येक गोष्टीला जाणणारा, तोच आश्रय मागणाऱ्यांना आश्रय देऊ शकतो. याच्यानंतर आता मग, त्या निशाण्यांची चर्चा करण्यात येत आहे, ज्या अल्लाहचा एकेश्वरवाद आणि त्याच्या सामर्थ्याची कमाल आणि त्याच्या हस्तक्षेप करण्याच्या सामर्थ्यावर प्रामाण्य आहेत.

३) म्हणजे रात्रीला अंध:कारमय बनवले की, लोकांनी इच्यात विश्रांती घेऊ शकावी; दिवसाला प्रकाशित केले की, रोजी कमविण्यात अडथळा येऊ नये. मग एका मागून एक दुसऱ्याचे येणे जाणे आणि कधी रात्रीचे मोठे आणि दिवसाचे लहान होणे. आणि कधी याच्या उलट दिवसाचे मोठे होणे आणि रात्रीचे लहान होणे. अशाच प्रकारे सूर्य आणि चंद्राचे आपआपल्या वेळेवर उगविणे आणि अस्त पावणे. आणि आपआपल्या कक्षेत आपला मार्ग अक्रमित रहाणे. आणि आपसात एक दुसऱ्याशी टक्कर होण्यापासून सुरक्षित रहाणे. ही सर्व या गोष्टींची प्रमाणे आहेत की, यांचा खचित्‌च

कोणी निर्माणकर्ता आणि मालक आहे. तसेच तो एक आणि एकच आहे. आणि ब्रम्हाडांत फक्त त्याचाच हस्तक्षेप आणि हुकूम चालतो. जर प्रयोजन आणि हुकुमाचा अधिकार बाळगणारे, एकापेक्षा जास्त असते, तर ही ब्रम्हांडाची व्यवस्था अशा सुनियोजित आणि व्यवस्थित पद्धतीने, कधी चालूशकली नसती.

४) यासाठी की हे पण तुमच्याप्रमाणे अल्लाहची सृष्टी आहेत. परमेश्वरी अधिकाराने संपन्न, किंवा त्याच्यांत सरकतदार नाहीत.

५) खाशिअत्न चा अर्थ, कोरडा आणि दुष्काळ ग्रस्त म्हणजे मृत.

६) म्हणजे नाना प्रकारची स्वादिष्ट फळे, आणि धान्य निर्माण करते.

७) मृत जमिनीला पावसाने अशा प्रकारे जिवंत करून देणे आणि तिला उगविण्याला योग्य बनवून देणे, या गोष्टीचे प्रमाण आहे की, तो मुर्द्यांना पण खचित्च जिवंत करील.

८) म्हणजे त्यांना मानत नाही, किंबहुना त्यांच्या पासून तोंड फिरविणे, फिरून जाणे, आणि त्यांना लबाड म्हणणे. ह.इब्ने अब्बास ﷺ नी 'इलाहाद्' चा अर्थ केला आहे, त्याच्या अनुषंगाने याच्यात ते बातिल फिरके (मिथ्या पंथ) पण येऊन जातात, जे आपल्या चुकीच्या धारणा आणि दृष्टीकोनांच्या सिद्ध करण्यासाठी, अल्लाहच्या महावाक्यांत अर्थांत बदल आणि लबाडीने फसवणूक करतात.

९) ही धर्माकडून फिरलेल्या (मग ते कोणत्याही प्रकारचे का असेनांत!) करीता कडक धमकावणी आहे.

१०) म्हणजे काय हे उभयंता समान होऊन शकतात? नाही. खचित्च नाही. याशिवाय याच्याने इशारा करून दिला की, धर्माकडून फिरलेले आगीत टाकले जातील. आणि ईमानवाले कयामतच्या दिवशी निर्भय असतील.

११) हा 'अम्र (हुकूम)' चा शब्द आहे. परंतु येथे त्याच्याने उद्देश्य धमकावणे आहे. कुफ्र आणि शिर्क आणि गुन्ह्या करीता. परवानगी नाही आणि ते विहीत नाहीत.

१२) कंसातील शब्द 'इन्न' च्या खबर महजुफ चे भाषांतर आहे. काहींनी, आणखी काही शब्द महजुफ मानले आहेत.

१३) म्हणजे हे पुस्तक, ज्याच्याकडून तोंड फिरविले जाते आणि पळ काढण्यात येतो, टिका टिप्पणी करणाऱ्यांच्या टिकेपेक्षा, फार उच्च आणि प्रत्येक दोषापासून पवित्र आहे.

१४) म्हणजे ते प्रत्येक प्रकारे सुरक्षित आहे. पुढून चा अर्थ आहे, कमी आणि मागूनचा अर्थ आहे, जास्त, म्हणजे असत्य याच्या पुढून येऊन याच्यात कमी आणि न याच्या मागून येऊन, याच्यांत वाढ करू शकते. आणि न कोणी बदल व हेरफेरच करण्यात यशस्वी होऊ शकतो. कारण की हे त्याच्याकडून प्रकट झाले आहे, जो आपल्या म्हणण्यात आणि करण्यात बुद्धीमान आहे. आणि प्रसंशनीय म्हणजे ज्याची स्तुती केली गेली आहे असा. किंवा तो ज्या गोष्टीचा हुकूम देतो, आणि ज्यापासून मना करतो; परिणाम आणि शेवटाच्या अनुषंगाने सर्व पशंसनीय आहेत. म्हणजे चांगले आणि फायदेकारक आहेत. (इब्ने कसीर)

१५) म्हणजे मागील लोकांनी आपल्या पैगंबरांना खोटे ठरविण्यासाठी, जे काही म्हटले की हे जादूगार आहेत, वेडे आहेत, लबाड आहेत वगैरे वगैरे; तेच काही मक्केच्या काफिरांनी सुद्धा आपणास म्हटलेले आहे. हे जणू आपले सांत्वन केले जात आहे. की, आपल्याला खोटे ठरविणे आणि आपला जादू, लबाडी आणि वेडेपणाशी संबंध जोडणे, नवी गोष्ट नाही; प्रत्येक पैगंबराबरोबर हेच काही होत आले आहे. जसे दुसरे ठिकाणी सांगितले, ''जे लोक यांच्यापूर्वी होऊन चुकले आहेत, त्यांच्यापाशी जो पण पैगंबर आला, त्यांनी सांगून टाकले की, एकतर हा जादूगार आहे, किंवा वेडा आहे. काय हे या गोष्टीची एक दुसऱ्याला ताकीद करीत आले आहेत? नाही. किंबहुना हे सर्वच्या सर्व शिरजोर आहेत. (सू.जारियात-५२-५३) दुसरा अर्थ याचा हा आहे की, आपणास एकेश्वरवाद आणि शुद्ध आज्ञापालनाचा जो हुकूम दिला गेला आहे, या त्याच गोष्टी आहेत, ज्या आपल्या पूर्वीच्या पैगंबरांना सुद्धा सांगण्यात आल्या होत्या. यासाठी की, सर्व धर्मशास्त्रे या गोष्टींवर एकमत राहिली आहेत. किंबहुना सर्वांचे प्रथम आवाहन, एकेश्वरवाद आणि फक्त अल्लाहसाठीच शुद्ध आज्ञापालन होते. (फत्हुल कदीर)

१६) म्हणजे त्या ईमान आणि एकेश्वरवादवाल्यांकरीता जे क्षमेला पात्र आहेत.

१७) यांच्याकरीता जे काफिर आणि अल्लाहच्या पैगंबरांचे शत्रू आहेत. हे महावाक्य पण सू.हिज्रचे महावाक्य (४९,५०) ''माझ्या सेवकांना सांगून द्या, मी क्षमाकर्ता आणि दयाळूआहे आणि माझी शिक्षापण, कडक शिक्षाआहे.'' च्या सारखे आहे.

وَلَوْ جَعَلْنٰهُ قُرْاٰنًا اَعْجَمِيًّا لَّقَالُوْا لَوْلَا فُصِّلَتْ اٰيٰتُهٗ ؕ
ءَاَعْجَمِيٌّ وَّعَرَبِيٌّ ؕ قُلْ هُوَ لِلَّذِيْنَ اٰمَنُوْا هُدًى
وَّشِفَآءٌ ؕ وَالَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ فِيْۤ اٰذَانِهِمْ وَقْرٌ وَّهُوَ
عَلَيْهِمْ عَمًى ؕ اُولٰٓئِكَ يُنَادَوْنَ مِنْ مَّكَانٍۢ بَعِيْدٍ ۝٤٤ (ع ٥ ١٢ ١٩)

(ई ५ १२ १९) आणि जर आम्ही त्याला परकीय भाषेचे कुरआन बनविते, तर म्हणते[१] की, याची महावाक्ये चांगली स्पष्ट करून का सांगण्यात आली नाहीत?[२] हे काय परकीय भाषेतील पुस्तक आणि तुम्ही अरबी पैगंबर?[३] आपण सांगून द्या की, हे तर ईमानवाल्यांसाठी हिदायत आणि परिहार आहे; आणि जे ईमान आणित नाहीत, त्यांच्या कानांत तर (बहिरेपणा आणि) बधिरत्व आहे, आणि हे त्यांच्यावर आंधळेपणा आहे. हे ते लोक आहेत, (जणू) जे फार दुरवरूनच्या ठिकाणावरून बोलाविले जात आहेत[४] ४४

وَلَقَدْ اٰتَيْنَا مُوْسَى الْكِتٰبَ فَاخْتُلِفَ فِيْهِ ؕ وَلَوْلَا
كَلِمَةٌ سَبَقَتْ مِنْ رَّبِّكَ لَقُضِيَ بَيْنَهُمْ ؕ وَاِنَّهُمْ
لَفِيْ شَكٍّ مِّنْهُ مُرِيْبٍ ۝٤٥

खचित्‌च आम्ही मूसास पुस्तक दिले होते. तर त्यांच्यात सुद्धा मतभेद करण्यांत आला;[५] आणि जर ती गोष्ट नसती, जी तुमच्या पालनकर्त्याकडून पूर्वीच नक्की होऊन चुकली आहे.[६] तर त्यांच्या दर्म्यान (कधीचा) फैसला होऊन चुकला असता.[७] हे लोक तर त्याच्याविषयी बेचैन करणाऱ्या संशयात पडले आहेत.[८] ४५

مَنْ عَمِلَ صَالِحًا فَلِنَفْسِهٖ وَمَنْ اَسَآءَ فَعَلَيْهَا ؕ وَمَا
رَبُّكَ بِظَلَّامٍ لِّلْعَبِيْدِ ۝٤٦

जो मनुष्य चांगली कामे करील, तो आपल्या फायद्यासाठी; आणि जो वाईट कामे करील, त्याचा दुष्परिणाम पण त्याच्यावरच[९] आहे. आणि तुमचा पालनकर्ता सेवकांवर जुलूम करणारा नाही.[१०] ४६

१) म्हणजे अरबीच्या ऐवजी, कोण्या दुसऱ्या भाषेत कुरआन अवतरीत करतो.

२) म्हणजे आमच्या भाषेत त्याला का सांगण्यात आले नाही, ज्याला आम्ही समजू शकतो. कारण की, आम्ही तर अरब आहोत, परकीय भाषा समजत नाहीत.

३) हे पण काफिरांचे म्हणणे आहे की, ते आश्चर्य करतो की, पैगंबर तर अरबी आहे. आणि कुरआन याच्यावर परकीय भाषेत अवतीर्ण झाले आहे. अर्थ हा आहे की, कुरआनाला अरबी भाषेत अवतरित करून, प्रथम संबोधित अरबांकरीता, काही सबब बाकी ठेवली नाही. जर हे अरबेतर भाषेत असते तर ते सबब पुढे करू शकले असते. जेणेकरून अल्लाहतआलाने प्रत्येक पैगंबरास त्याच भाषेत पाठविले, जी त्याच्या समूहाची भाषा होती. ''आम्ही प्रत्येक पैगंबरास त्याच्या समूहाच्या भाषेतच पाठविला'' (सू.इब्राहीम-४) जर पैगंबरांची भाषाच वेगळी असती तर पैगंबरी देण्याचा उद्देश्यच नष्ट झाला असता. तो आपल्या समूहाला कशाप्रकारे अल्लाहकडे बोलावितो? आणि समूह त्यावर कसे काय ईमान आणते? जेव्हा की ते आपल्या पैगंबराच्या भाषेपासूनच अनभिज्ञ आहेत. याच्याने ही गोष्ट स्पष्ट होते की, उपदेशकाला त्या भाषेवर पूर्ण प्रभुत्व प्राप्त केले पाहिजे जी त्याची स्थायी भाषा आहे. जेणेकरून प्रभावीपणे मनमोहक शैलीमध्ये आवाहनाचे कर्तव्य पार पाडले जाऊ शकावे.

४) म्हणजे ज्याप्रमाणे दुरवरचा मनुष्य, त्याच्या दुरीमुळे, बोलाविणाऱ्याचा आवाज ऐकण्यास असमर्थ असतो, अशाचप्रकारे या लोकांची अक्कल आणि समजमध्ये हे कुरआन येत नाही.

५) यात पुन्हा नबी ﷺ चे सांत्वन करण्यात येत आहे की, मक्केवाले आपल्यावर अवतीर्ण केलेल्या कुरआनाविषयी शंकाकुशंका करतात. आणि यात चुका काढतात. तर ही काही कोणी नवीन गोष्ट नाही. मूसा عليه السلام वर जे पुस्तक (तौरात) अवतीर्ण केले गेले होते, त्याच्यातही मतभेद केला गेला. जसे समूहांची ही प्राचीन रीत चालत येत आहे की, ते पैगंबरावर अवतीर्ण केलेल्या पुस्तकांमध्ये मतभेद करतात व त्यास व्यंग व टिकेचे लक्ष्य बनवतात.

६) की त्यांना शिक्षा देण्याच्या पहिले, ढिल देण्यात येईल, ''परंतु अल्लाहतआला त्यांना एका ठराविक वेळेपर्यंत, ढिल देत आहे.'' (सू.फातिर-४५)

७) म्हणजे लगेच त्यांना शिक्षा देऊन गारद करून देण्यात आले असते.

८) म्हणजे त्यांचा नकार अक्कल आणि दुरदृष्टीने नाही; किंबहुना निव्वळ संशयाने आहे; जो त्यांना अस्वस्थ करून सोडतो.

९) यासाठी की, तो शिक्षा फक्त त्यालाच देतो, जो गुन्हेगार असतो. असे नाही की, असेच ज्याला इच्छील, त्याला शिक्षेत ग्रस्त करून टाकील.

१०) याचा एक अर्थ तर हा आहे की, तो शिक्षा गुन्ह्यांवर देतो, जो लोकांच्या आज्ञाभंजनाचा बदला आहे. स्पष्ट आहे की, हा जुलूम नाही. दुसरा अर्थ आहे की, तो प्रत्येक वस्तूचा मालक आहे. तो आपल्या संपत्तीत जसा इच्छिल तसा हस्तक्षेप करील. त्याला हा अधिकार प्राप्त आहे. त्याला कोणीही जुलूम करार देऊ शकत नाही. तिसरा अर्थ आहे की तो पुण्यवाणांना चांगले प्रतिफल देतो व देत राहील. आणि वाईटांना शिक्षा देतो व देत राहील आणि हा खरा न्याय आहे, अन्याय नाही. (फत्हुल कदीर, सू.आले इमरान)

**कयामतचे ज्ञान फक्त अल्लाहकडेच[१] परतवले जाते. आणि जी जी फळे**

**اِلَيۡهِ يُرَدُّ عِلۡمُ السَّاعَةِ ؕ وَمَا تَخۡرُجُ مِنۡ ثَمَرٰتٍ**

**आपल्या आपल्या घडातून निघतात; आणि जी मादी गर्भ धारण करते. आणि जी पिले त्यांना होतात, सर्वांचे ज्ञान त्यालाच[२] आहे. ज्या दिवशी अल्लाहतआला त्या (मुशरिकांना) बोलावून विचारील (की) माझे सरकतदार कोठे आहेत; ते उत्तर देतील की, आम्ही तर तुला सांगून टाकले की आमच्यांतून कोणीही यांचा प्रत्यक्ष साक्षी[३] नाही ४७**

مِّنۡ اَكۡمَامِهَا وَمَا تَحۡمِلُ مِنۡ اُنۡثٰى وَلَا تَضَعُ اِلَّا بِعِلۡمِهٖ ؕ وَيَوۡمَ يُنَادِيۡهِمۡ اَيۡنَ شُرَكَآءِىۡ ۙ قَالُوۡۤا اٰذَنّٰكَ ۙ مَا مِنَّا مِنۡ شَهِيۡدٍ ۚ ﴿۴۷﴾

**आणि ज्यांची ज्यांची उपासना याच्यापूर्वी करीत होते, ते त्यांच्या नजरेतून हरवून[४] गेलेत. आणि त्यांनी समजून घेतले की आता त्यांच्या करीतां कोणताच बचाव नाही[५] ४८**

وَضَلَّ عَنۡهُمۡ مَّا كَانُوۡا يَدۡعُوۡنَ مِنۡ قَبۡلُ وَظَنُّوۡا مَا لَهُمۡ مِّنۡ مَّحِيۡصٍ ﴿۴۸﴾

**भलाई मागण्यापासून मनुष्य थकत नाही.[६] आणि जर त्याला काही त्रास पोहचेल तर तेव्हाच निराश व हताश होऊन जातो[७] ४९**

لَا يَسۡـَٔـمُ الۡاِنۡسَانُ مِنۡ دُعَآءِ الۡخَيۡرِ وَاِنۡ مَّسَّهُ الشَّرُّ فَيَـُٔوۡسٌ قَنُوۡطٌ ﴿۴۹﴾

**आणि जे संकट त्याच्यावर येऊन चुकले आहे, याच्यानंतर जर आम्ही त्याला कोण्या दयेची गोडी चाखवू, तर तो बोलून पडतो की, याचा तर मी हक्कदारच[८] होतो. आणि मी विचार करु शकत नाही. कयामत कायम होईल; आणि जर मी आपल्या पालनकर्त्याकडे परत पाठविला गेलो तरी सुद्धा, खचित्‌च माझ्याकरीता त्यांच्याजवळ कल्याणच कल्याण आहे.[९] खचित्‌च आम्ही या काफिरांना त्यांच्या कर्मांनी खबरदार करू; आणि त्यांना कडक शिक्षेची गोडी चाखवू ५०**

وَلَـئِنۡ اَذَقۡنٰهُ رَحۡمَةً مِّنَّا مِنۡۢ بَعۡدِ ضَرَّآءَ مَسَّتۡهُ لَيَقُوۡلَنَّ هٰذَا لِىۡ ۙ وَمَاۤ اَظُنُّ السَّاعَةَ قَآئِمَةً ۙ وَّلَـئِنۡ رُّجِعۡتُ اِلٰى رَبِّىۡۤ اِنَّ لِىۡ عِنۡدَهٗ لَلۡحُسۡنٰى ۚ فَلَنُنَبِّئَنَّ الَّذِيۡنَ كَفَرُوۡا بِمَا عَمِلُوۡا وَلَنُذِيۡقَنَّهُمۡ مِّنۡ عَذَابٍ غَلِيۡظٍ ﴿۵۰﴾

**आणि जेव्हा आम्ही मनुष्यांवर आपली कृपा करतो; तर तो तोंड फिरवितो; आणि अंग काढून[१०] घेतो आणि जेव्हा त्याच्यावर संकट येते, तर मोठ्या लांबलचक प्रार्थना करू लागतो.[११] ५१**

وَاِذَاۤ اَنۡعَمۡنَا عَلَى الۡاِنۡسَانِ اَعۡرَضَ وَنَاٰ بِجَانِبِهٖ ۚ وَاِذَا مَسَّهُ الشَّرُّ فَذُوۡ دُعَآءٍ عَرِيۡضٍ ﴿۵۱﴾

**आपण (यांना) विचारा की बरे! हे तर सांगा की, जर हे कुरआन अल्लाहकडून आले असेल, मग तुम्ही त्याला मानणार नाही, तर याच्यापेक्षा जास्त बहकलेला कोण असेल,[१२] जो विरोधांत (सत्यापासून) दूर होऊन जाईल.[१३] ५२**

قُلۡ اَرَءَيۡتُمۡ اِنۡ كَانَ مِنۡ عِنۡدِ اللّٰهِ ثُمَّ كَفَرۡتُمۡ بِهٖ مَنۡ اَضَلُّ مِمَّنۡ هُوَ فِىۡ شِقَاقٍ ۢ بَعِيۡدٍ ﴿۵۲﴾

**लवकरच आम्ही त्याला आपल्या निशाण्या जगाच्या आसमंतातही दाखवू. आणि खुद्द यांच्यातही येथपावेतो त्यांच्यावर जाहीर होऊन जावे की, सत्य हेच[१४] आहे. काय आपल्या पालनकर्त्याचे प्रत्येक गोष्टीला परिचीत आणि ठाऊक असणे, पुरेसे नाही?[१५] ५३**

سَنُرِيۡهِمۡ اٰيٰتِنَا فِى الۡاٰفَاقِ وَفِىۡۤ اَنۡفُسِهِمۡ حَتّٰى يَتَبَيَّنَ لَهُمۡ اَنَّهُ الۡحَـقُّ ؕ اَوَلَمۡ يَكۡفِ بِرَبِّكَ اَنَّهٗ عَلٰى كُلِّ شَىۡءٍ شَهِيۡدٌ ﴿۵۳﴾

१) म्हणजे अल्लाहच्या शिवाय तिच्या घडून येण्याचे कोणाला ज्ञान नाही. याच करीतांजेव्हां ह.जिब्रईल ﵇ नी नबी करीम ﷺ ला, कयामतच्या घडून येण्याच्या बाबतीत विचारले तेव्हा आपण ﷺ नी सांगितले होते, ''याच्या बाबतीत मला ही तेवढेच ज्ञान आहे, जेवढे तुला आहे. मी तुझ्यापेक्षा जास्त जाणीत नाही.'' (सू. सॉद-४०) दुसऱ्या ठिकाणी अल्लाहतआलाने फर्माविले, ''तिच्या ज्ञानाचा शेवट तर अल्लाहकडे आहे.'' (सू.नाजिआत-४४) 'तिच्या वेळेवर तिला अल्लाहच्या शिवाय आणखी कोणी जाहीर करणार नाही.'' (सू.अअराफ-१८७)

२) हे अल्लाहच्या संपूर्ण आणि सर्वव्यापी ज्ञानाचे वर्णन आहे. आणि याच्या विशिष्ट ज्ञानांत, कोणी त्याचा सरकतदार नाही. म्हणजे अशाप्रकारे संपूर्ण ज्ञान कोणाजवळ नाही. येथपावेतो की पैगंबरांना सुद्धां नाही. त्यांना पण तेवढेच ज्ञान असते, जेवढे अल्लाहतआला त्यांना वह्य मार्फत सांगून देतो. आणि या वह्याच्या ज्ञानाचा संबंध सुद्धां पैगंबरीपद आणि त्याच्या तगाद्यांच्या पूर्ततेशीच संबंधीत असतो. न की दुसरे कौशल्य आणि इतर मामल्यांशी संबंधीत. म्हणून कोणाही पैगंबराला मग तो कितीका महान असेना 'आलिम मा काना व मा यकूनु' म्हणणे बरोबर नाही. कारण ही फक्त

एका अल्लाहची शान आणि वैशिष्ट्य आहे. ज्याच्यांत आणखी कोणाला शामील मानणे, शिर्क होईल.
३) म्हणजे आज आमच्यांतून कोणी मनुष्य हे मानावयास तयार नाही की, तुझा कोणी सरकतदार आहे ?
४) म्हणजे जे इकडे तिकडे होऊन गेलेत, आणि त्यांच्या कल्पनेप्रमाणे, त्यांनी कोणाला फायदा पोहचविला नाही.
५) हा अंदाज, भरवश्याच्या अर्थांत आहे. म्हणजे कयामतच्या दिवशी त्यांना हा भरवसा करणे भाग पडेल की, त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वांचविणारा कोणी नाही. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आणि गुन्हेगार नरकाग्नीला पाहून समजून जातील की ते इच्यांत झोंकून दिले जाणार आहेत. परंतु इच्यापासून बचावाची जागा पावणार नाहीत.'' (सू.कहफ-५३)
६) म्हणजे जगांतील धन व साधन सामुग्री, तंदुरुस्ती आणि शक्ती, मान सन्मान आणि उच्च पद, आणि दुसऱ्या ऐहिक देणग्या मागतां, मागतां मनुष्य थकत नाही, किंबहुना मागतच रहातो. मनुष्याने अभिप्रेत मनुष्यांची जास्त बहुसंख्यता आहे.
७) म्हणजे त्रास पोहचल्यास लगेच निराशेचा बळी होऊन जातो. जेव्हा की अल्लाहच्या प्रांजल सेवकांची स्थिती याहून वेगळी असते. ते एक तर इहलोकाचे इच्छुक नसतात. आणि त्यांच्यासमोर नेहमी परलोकच असतो. दुसरे, त्रास झाल्यावर सुद्धा ते अल्लाहची दया आणि त्याच्या कृपेकडून निराश होत नाही. किंबहुना कसोटींना सुद्धा ते गुन्ह्याचे प्रायश्चित्त आणि दर्जे उंच होण्याला कारणीभूत समजतात. जणूं निराशा त्यांच्या जवळ पण फटकत नाही.
८) म्हणजे अल्लाहजवळ मी प्रिय आहे. तो माझ्यावर खूष आहे. म्हणूनच तो मला आपल्या देणग्या बहाल करतो. वास्तविक इहलोकाचे कमी जास्त, त्याच्या प्रेम किंवा नाराजीचे चिन्ह नाही. परंतु फक्त कसोटी घेण्याकरताअल्लाह असे करतो, कारण की त्याने पहावे की, देणग्यांमध्ये त्याचे आभार कोण मानतो आणि त्रासांमध्ये सहनशील कोण आहे ?
९) हे म्हणणारा दांभिक किंवा काफिर आहे. कोणी ईमानवाला अशी गोष्ट सांगू शकत नाही. काफिरच असे समजतो की, माझी दुनिया चांगल्या प्रकारे घालविली जात आहे. तर परलोकपण माझ्यासाठी असाच होईल.
१०) म्हणजे सत्त्यापासून तोंड फिरवून घेतो, आणि सत्यपालनापासून अंग काढून घेतो आणि अहंकार दाखवितो.
११) म्हणजे अल्लाहच्या समक्ष रडतो व व्याकुळता दाखवितो की, त्याने संकटाला दूर करून द्यावे. म्हणजे कठीण परिस्थितीत अल्लाहचे स्मरण करतो. आणि खुषीत त्याला विसरून जातो. वेळी अल्लाहजवळ याचना करतो. देणग्या मिळाल्यानंतर, त्याचे तो स्मरण करीत नाही.
१२) म्हणजे अशा स्थितीत, तुमच्या पेक्षा जास्त बहकलेला, आणि तुमच्यापेक्षा जास्त शत्रू कोण असेल ?
१३) शिकाकचा अर्थ आहे हट्ट, अहंकार आणि विरोध 'बईद' मिळून त्यांच्यात आणखी वाढ होऊन जाते. म्हणजे जो फारच जास्त विरोध आणि अहंकार करतो. येथ पावेतो की अल्लाहच्या अवतीर्ण केलेल्या कुरआनाला सुद्धा खोटे ठरवितो. याच्यापेक्षां जास्त बहकलेला आणि दुर्दैवी कोण असूंशकतो?
१४) ज्याच्याने कुरआनाची सत्यता आणि त्याचे अल्लाहकडून होणे स्पष्ट होऊन जाईल. म्हणजे 'अन्नहु' मध्ये जमीर चा मर्जा कुरआन आहे. काहींनी याचा मर्जा इस्लाम किंवा रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला सांगितले आहे. सर्वांचा सारांश एकच आहे. 'आफाक' 'उफुक' चे अनेकवचन आहे. म्हणजे किनारा. अर्थ आहे की आम्ही आपल्या निशाण्या बाहेर किनाऱ्यांमध्ये सुद्धा दाखवूंआणि स्वत: मनुष्याच्या आपल्या जिवांत सुद्धा. म्हणून आकाश व पृथ्वीच्या किनाऱ्यांमध्ये निसर्गाच्या मोठमोठ्या निशाण्या आहेत. उदाहरणार्थ सूर्य, चंद्र, तारे, रात्र आणि दिवस वारा आणि पाऊस, गडगडाट आणि चमक, वीजा, मेघगर्जना, वनस्पती आणि खनीजे, वृक्ष, पर्वत आणि नद्या व समुद्र वगैरे आणि जिवांतील निशाण्यांनी मनुष्याचे अस्तित्व ज्या गोष्टींवर अवलंबून आहे, त्या अभिप्रेत आहेत. काही म्हणतात की, आफाक ने अभिप्रेत पूर्व आणि पश्चीम चे लांबवरचे इलाखे आहेत, ज्यांच्यावर विजय मिळविणे, अल्लाहने मुसलमानांना सोपे करून टाकले. आणि 'अन्फुस' ने अभिप्रेत खुद्द अरबस्थानच्या भूमीवर मुसलमानांचे वर्चस्व आहे. जसे बद्रचे युद्ध, आणि मक्केचा विजय, वगैरे विजयांमध्ये मुसलमानांना प्रतिष्ठा व मान सन्मान बहाल केला गेला.
१५) प्रश्न विचारणे होकारार्थी आहे की, अल्लाहतआला आपल्या सेवकांचे म्हणणे आणि करणे पाहण्यांस पुरेसा आहे. आणि तोच या गोष्टीची साक्ष देत आहे की कुरआन अल्लाहची वाणी आहे. जी त्याचे खरे पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर अवतीर्ण झाली.

अलसा इन्नहुम फी मिर्यतिम मिल्लिकाई रब्बिहिम, अला इन्नहू बिकुल्लि शैइम मुहीत (५४)

أَلَآ إِنَّهُمْ فِي مِرْيَةٍ مِّن لِّقَآءِ رَبِّهِمْ ۗ أَلَآ إِنَّهُۥ بِكُلِّ شَيْءٍ مُّحِيطٌۢ ﴿٥٤﴾

विश्वास ठेवा की, हे लोक आपल्या पालनकर्त्याच्या समोरासमोर होण्यापासून संशयात पडलेले आहेत. [१] लक्षांत ठेवा, अल्लाहतआला प्रत्येक वस्तुस व्यापून आहे. [२] (५४)

महावाक्ये ५३ | (४२) सू. शूरा | रुकूअ ५

आयातुहा ٥٣ (٤٢) سُورَةُ الشُّورَىٰ مَكِّيَّةٌ (٦٢) رُكُوعَاتُهَا ٥

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

حمٓ ﴿١﴾

हा मीम (१)

عٓسٓقٓ ﴿٢﴾

ऐन-सीन-काफ (२)

كَذَٰلِكَ يُوحِيٓ إِلَيْكَ وَإِلَى ٱلَّذِينَ مِن قَبْلِكَ ٱللَّهُ ٱلْعَزِيزُ ٱلْحَكِيمُ ﴿٣﴾

अल्लाहतआला जो सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे, अशाचप्रकारे तुझ्याकडे आणि जे तुझ्यापूर्वी होऊन गेले आहेत त्यांच्याकडे वह्य पाठवित राहिला आहे. [३] (३)

لَهُۥ مَا فِي ٱلسَّمَٰوَٰتِ وَمَا فِي ٱلْأَرْضِ ۖ وَهُوَ ٱلْعَلِيُّ ٱلْعَظِيمُ ﴿٤﴾

आकाशातील (सर्व) वस्तूं, आणि जे काही पृथ्वीत आहे सर्व त्याचेच आहे. तो थोर आणि महिमाशाली आहे. (४)

تَكَادُ ٱلسَّمَٰوَٰتُ يَتَفَطَّرْنَ مِن فَوْقِهِنَّ ۚ وَٱلْمَلَٰٓئِكَةُ يُسَبِّحُونَ بِحَمْدِ رَبِّهِمْ وَيَسْتَغْفِرُونَ لِمَن فِي ٱلْأَرْضِ ۗ أَلَآ إِنَّ ٱللَّهَ هُوَ ٱلْغَفُورُ ٱلرَّحِيمُ ﴿٥﴾

जवळच आहे की आकाश आपल्यावरून फाटून पडेल. [४] आणि सर्व देवदूत आपल्या पालनकर्त्याच्या पावित्र्य व स्तुती वर्णन करीत आहेत. आणि पृथ्वीवाल्यांसाठी क्षमा मागीत आहेत. [५] पाहा हो! अल्लाहतआलाच क्षमाकर्ता आणि कृपाळू आहे. [६] (५)

وَٱلَّذِينَ ٱتَّخَذُوا۟ مِن دُونِهِۦٓ أَوْلِيَآءَ ٱللَّهُ حَفِيظٌ عَلَيْهِمْ وَمَآ أَنتَ عَلَيْهِم بِوَكِيلٍ ﴿٦﴾

आणि ज्या लोकांनी त्याच्या शिवाय दुसऱ्यांना पुरस्कर्ते बनवून घेतले आहे, अल्लाहतआला त्यांनापण खूप चांगल्याप्रकारे पहात आहे. [७] आणि तुम्ही त्यांच्यावर जबाबदार नाही. [८] (६)

१) म्हणून या बाबतीत चिंतन आणि मनन करीत नाहीत, न त्यासाठी कर्म करतात. न त्या दिवसाचे काही भय त्यांच्या मनांत आहे.

२) म्हणून त्याच्या करीता कयामत घडवून आणणे मुळीच कठीण काम नाही. कारण की सर्व सृष्टीवर त्याचे वर्चस्व आणि अधिकार आहे. तो याच्यात जसा इच्छील हस्तक्षेप करील, करतो, आणि करूंशकतो. कोणी त्याला रोकणारा नाही.

३) म्हणजे ज्या प्रमाणे हे कुरआन तुझ्याकडे अवतीर्ण केले गेले आहे, अशाच प्रकारे तुझ्या पूर्वीच्या पैगंबरावर लहान पुस्तिका आणि पुस्तके अवतीर्ण केली गेली. वह्य अल्लाहची ती वाणी आहे, जी देवदूतामार्फत अल्लाहतआला आपल्या पैगंबरांकडे पाठवीत राहिला आहे. एका सहाबी ﷺ नी रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला 'वह्य' ची वस्तुस्थिती विचारली. आपण फर्माविले की, कधी तर हे मजजवळ घंटीच्या आवाजासारखे येते, आणि हे माझ्यावर फार कठीण होते. आणि जेव्हा हे संपते, तेव्हां मला पाठ होऊन गेलेले असते. आणि कधी देवदूत मानवी स्वरूपांत येतो. आणि माझ्याशी संभाषण करतो. आणि तो जे काही म्हणतो, मी ते पाठ करून घेतो. हजरत आएशा رضي الله عنها म्हणतात मी कडक थंडीत पाहिले की, जेव्हां वह्यची अवस्था संपते तेव्हा आपण ﷺ घामाघूम होऊन जात. आणि आपल्या कपाळातून घर्मबिंदु टपकत असत. (स.बुखारी)

४) अल्लाहच्या महानता आणि दबदब्यामुळे.

५) हा विषय सू.मोमिनच्या ७ व्या आयतमध्ये सुद्धा सांगण्यात आला आहे.

६) आपले मित्र आणि आज्ञापालन करणाऱ्यांसाठी, किंवा सर्वच सेवकांसाठी, कारण की काफिर आणि आज्ञाभंजकाची लगेच पकड न करणे किंबहुना त्यांना एका ठराविक वेळेपर्यंत ढील देणे, हे पण त्याच्या दया आणि क्षमेच्या प्रकारांतून आहे.

७) म्हणजे त्यांच्या कर्मांना सुरक्षित करीत आहे; की त्यावर त्यांना मोबदला दिला जावा.

८) म्हणजे आपण या गोष्टीला जबाबदार नाही की, त्यांना हिदायतच्या मार्गावर लावून द्यावे. किंवा त्यांच्या गुन्ह्यांवर त्यांची पकड करावी. किंबहुना ही कामे आमची आहेत. आपले काम फक्त पोहचवून देणे आहे.

وَ كَذٰلِكَ اَوْحَيْنَآ اِلَيْكَ قُرْاٰنًا عَرَبِيًّا لِّتُنْذِرَ اُمَّ الْقُرٰى وَ مَنْ حَوْلَهَا وَتُنْذِرَ يَوْمَ الْجَمْعِ لَا رَيْبَ فِيْهِ ؕ فَرِيْقٌ فِى الْجَنَّةِ وَفَرِيْقٌ فِى السَّعِيْرِ ۷

अशाच प्रकारे आम्ही आपल्याकडे अरबी कुरआनाचे वह्य केले आहे.[१] यासाठी की आपण मक्कावाल्यांना आणि त्याच्या आसपासच्या लोकांना सावध करून द्यावे.[२] आणि गोळा होण्याच्या दिवसापासून, ज्याच्या[३] येण्यांत कोणी शंका नाही, भिववावे, एक पक्ष स्वर्गांत आणि एक पक्ष नर्कात असेल.[४] ७

وَلَوْ شَآءَ اللّٰهُ لَجَعَلَهُمْ اُمَّةً وَّاحِدَةً وَّلٰكِنْ يُّدْخِلُ مَنْ يَّشَآءُ فِىْ رَحْمَتِهٖ ؕ وَ الظّٰلِمُوْنَ مَا لَهُمْ مِّنْ وَّلِىٍّ وَّلَا نَصِيْرٍ ۸

जर अल्लाहतआला इच्छितांतर सर्व लोकांना एकाच पंथाचा[५] बनविता परंतु तो ज्याला इच्छितो त्याला आपल्या दयेत दाखल करून घेतो. आणि जालीमांचा कोणी पुरस्कर्ता आणि मददगार नाही. ८

اَمِ اتَّخَذُوْا مِنْ دُوْنِهٖٓ اَوْلِيَآءَ ۚ فَاللّٰهُ هُوَ الْوَلِىُّ وَهُوَ يُحْىِ الْمَوْتٰى ۫ وَهُوَ عَلٰى كُلِّ شَىْءٍ قَدِيْرٌ ۹

काय त्या लोकांनी अल्लाहशिवाय आणखी कोणी पुरस्कर्ते बनवून ठेवले आहेत? (खरे पाहता) अल्लाहच पुरस्कर्ता आहे. तोच मृतांना जिवंत करील. आणि तो प्रत्येक गोष्टींवर सर्व समर्थ आहे.[६] ९

وَمَا اخْتَلَفْتُمْ فِيْهِ مِنْ شَىْءٍ فَحُكْمُهٗٓ اِلَى اللّٰهِ ؕ ذٰلِكُمُ اللّٰهُ رَبِّىْ عَلَيْهِ تَوَكَّلْتُ ۖ وَاِلَيْهِ اُنِيْبُ ۱۰

आणि ज्या ज्या गोष्टींत तुमचा मतभेद असेल, त्याचा फैसला अल्लाहकडेच[७] आहे. हाच अल्लाह माझा पालनकर्ता आहे. ज्यावर मी भरवसा करून ठेवला आहे. आणि ज्याच्याकडे मी झुकतो १०

१) म्हणजे आम्ही ज्याप्रमाणे प्रत्येक पैगंबर, त्याच्या लोकांच्या भाषेत पाठविला; अशाच प्रकारे आम्ही आपल्यावर अरबी भाषेत, कुरआन अवतीर्ण केले आहे. कारण की तुमचे लोक हीच भाषा बोलतात आणि समजतात.

२ )'उम्मुल कुरा' मक्केचे नांव आहे. याला ''वस्तीची आई'' यासाठी म्हणण्यांत आले आहे की ही अरबांची फार जुनी वस्ती आहे. जणूं ही सर्व वस्त्यांची आई आहे. ज्यांनी इच्याच पासून जन्म घेतला आहे. अभिप्रेत मक्केवाले आहेत. 'व मन् हव्लहा' मध्ये, याच्या पूर्व आणि पश्चिमेचे सर्व इलाखे शामील आहेत. या सर्वांना भिववावे की, जर त्यांनी कुफ्र आणि शिर्कपासून तौबा केली नाही, तर अल्लाहच्या शिक्षेला पात्र ठरतील.

३) कयामतच्या दिवसाला गोळा होण्याचा दिवस यासाठी म्हटले की, याच्यांत पुढील मागील सर्व मनुष्ये गोळा होतील. याशिवाय जुलूम करणारे आणि जुलूम झालेले, ईमानवाले आणि काफिर सर्व गोळा होतील. आणि आपआपल्या कर्मांप्रमाणे आणि मोबदला आणि शिक्षेला प्रात्र होतील.

४) ज्याने अल्लाहची आज्ञा पाळली असेल आणि त्याने मना केलेल्या आणि निषीद्ध केलेल्या गोष्टींपासून दूर राहिला असेल तो स्वर्गांत, आणि त्याचे आज्ञाभंजन आणि त्याने निषीद्ध केलेल्या गोष्टी केल्या असतील, तो नरकाग्नीत असेल. हेच ते दोन पक्ष असतील. तिसरा पक्ष असणार नाही.

५) या स्वरूपांत कयामतच्या दिवशी फक्त एकच पक्ष असता म्हणजे ईमानवाले आणि स्वर्गवाले; परंतु अल्लाहच्या प्रयोजनाने आणि मर्जीने या बळजबरीला पसंत केले नाही. किंबहुना माणसांची कसोटी घेण्याकरीतां त्याने माणसांना इरादा आणि अखत्याराचे स्वातंत्र्य दिले. ज्याने या स्वातंत्र्याचा बरोबर उपयोग केला, तो अल्लाहच्या दयेस पात्र होऊन गेला; आणि ज्याने याचा चुकीचा उपयोग केला, त्याने जुलूम केला की, अल्लाहने दिलेल्या स्वातंत्र्य आणि अधिकाराला अल्लाहच्याच आज्ञाभंजनात उपयोगांत आणले. म्हणून अशा जालीमांचा कयामतच्या दिवशी कोणी मददगार होणार नाही.

६) जर अशी गोष्ट आहे तर अल्लाहतआलाच या गोष्टीचा हक्कदार आहे की, त्यालाच मित्र आणि पुरस्कर्ता मानण्यांत यावे. न की त्यांना, ज्यांच्याजवळ कोणी अधिकारच नाही. आणि जे न ऐकण्याची आणि न उत्तर देण्याची क्षमता बाळगतात; न नफा आणि नुकसान पोहचविण्याची पात्रता.

७) या मतभेदाने अभिप्रेत, धर्माचा मतभेद आहे. ज्याप्रमाणे यहूदी धर्म, ख्रिस्ती धर्म आणि इस्लाम वगैरे मध्ये, आपसांत मतभेद आहे. आणि प्रत्येक धर्माचा अनुयायी दावा करतो की, त्याचा धर्म खरा आहे. वास्तविक पहातां सर्व धर्म एकाचवेळी बरोबर होऊं शकत नाही. खरा धर्म तर फक्त एकच आहे, आणि एकच असूंशकतो. जगांत खरा धर्म आणि सत्याचा मार्ग ओळखण्याकरीता अल्लाहतआलाचे कुरआन हजर आहे. परंतु जगांत लोक अल्लाहच्या या वाणीला आपला न्यायाधीश मानावयास तयार नाही. सरशेवटी कयामतचा दिवसच राहून जातो. ज्यांत अल्लाहतआला या मतभेदांचा फैसला करून टाकीन. आणि खऱ्यांना स्वर्गामध्ये आणि दुसऱ्यांना नरकाग्नीत दाखल करील.

فَاطِرُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ جَعَلَ لَكُمْ مِّنْ اَنْفُسِكُمْ اَزْوَاجًا وَّمِنَ الْاَنْعَامِ اَزْوَاجًا ۚ يَذْرَؤُكُمْ فِيْهِ ؕ لَيْسَ كَمِثْلِهٖ شَيْءٌ ۚ وَهُوَ السَّمِيْعُ الْبَصِيْرُ ﴿١١﴾

तो आकाश आणि पृथ्वीचा निर्माणतकर्ता आहे. त्याने तुमच्याकरीता तुमच्या जातीची जोडपी बनविली आहेत. (१) आणि चतुष्पादांची जोडपी पण बनविली आहेत. (२) तुम्हास तो इच्यांत फैलावित राहिला आहे. (३) त्याच्या समान कोणी वस्तू नाही. (४) तो ऐकणारा आणि पाहणारा आहे. ⑪

لَهٗ مَقَالِيْدُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۚ يَبْسُطُ الرِّزْقَ لِمَنْ يَّشَآءُ وَيَقْدِرُ ؕ اِنَّهٗ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿١٢﴾

आकाश आणि पृथ्वीच्या किल्ल्या त्याच्याच आहेत. (५) तो ज्याची इच्छितो अन्नसंपत्ती वाढवून देतो आणि (ज्याला इच्छितो त्याला) काटकसरीने देतो. खचित्‌च तो प्रत्येक गोष्टीला जाणणारा आहे. ⑫

شَرَعَ لَكُمْ مِّنَ الدِّيْنِ مَا وَصّٰى بِهٖ نُوْحًا وَّالَّذِيْٓ اَوْحَيْنَآ اِلَيْكَ وَمَا وَصَّيْنَا بِهٖٓ اِبْرٰهِيْمَ وَمُوْسٰى وَعِيْسٰٓى اَنْ اَقِيْمُوا الدِّيْنَ وَلَا تَتَفَرَّقُوْا فِيْهِ ؕ كَبُرَ عَلَى الْمُشْرِكِيْنَ مَا تَدْعُوْهُمْ اِلَيْهِ ؕ اَللّٰهُ يَجْتَبِيْٓ اِلَيْهِ مَنْ يَّشَآءُ وَيَهْدِيْٓ اِلَيْهِ مَنْ يُّنِيْبُ ﴿١٣﴾

अल्लाहतआलाने तुमच्याकरीता तेच धर्मशास्त्र निश्चित करून दिले आहे, ज्याच्या कायम करण्याचा त्याने नूहला हुकूम दिला होता. आणि जो (वह्याच्या मार्फत) आम्ही तुझ्याकडे पाठवून दिला आहे. आणि ज्याचा ताकीदी हुकूम आम्ही इब्राहीम आणि मूसा आणि इसा ला दिला होता. (६) की या धर्माला कायम ठेवावे. (७) आणि याच्यांत फुट (८) टाकू नये. ज्या गोष्टींकडे आपण त्यांना बोलावित आहांत ती तर या मुशरिक लोकांना फारच जड (९) वाटते. अल्लाहतआला ज्याला इच्छील त्याला आपल्या करीता निवडून घेईल; (१०) आणि जो पण त्याच्याकडे वळतो तो त्याला बरोबर मार्गदर्शन करतो. (११) ⑬

وَمَا تَفَرَّقُوْٓا اِلَّا مِنْۢ بَعْدِ مَا جَآءَهُمُ الْعِلْمُ بَغْيًاۢ بَيْنَهُمْ ؕ وَلَوْلَا كَلِمَةٌ سَبَقَتْ مِنْ رَّبِّكَ اِلٰٓى اَجَلٍ مُّسَمًّى لَّقُضِيَ بَيْنَهُمْ ؕ وَاِنَّ الَّذِيْنَ اُوْرِثُوا الْكِتٰبَ مِنْۢ بَعْدِهِمْ لَفِيْ شَكٍّ مِّنْهُ مُرِيْبٍ ﴿١٤﴾

या लोकांनी आपल्याजवळ ज्ञान आल्यानंतरच मतभेद केला. (आणि तो पण) आपसातील हेकटपणामुळे. (१२) आणि जर तुमच्या पालनकर्त्याची गोष्ट, एका निश्चित वेळेपर्यंत पूर्वीपासूनच नक्की झाली नसती. तर खचित्‌च यांचा फैसला होऊन चुकला असतां. (१३) आणि ज्या लोकांना याच्यानंतर पुस्तक दिले गेले आहे, ते पण याच्याकडून संशयांत पडलेले आहेत (१४) ⑭

فَلِذٰلِكَ فَادْعُ ۚ وَاسْتَقِمْ كَمَآ اُمِرْتَ ۚ وَلَا تَتَّبِعْ اَهْوَآءَهُمْ ۚ وَقُلْ اٰمَنْتُ بِمَآ اَنْزَلَ اللّٰهُ مِنْ كِتٰبٍ ۚ وَاُمِرْتُ لِاَعْدِلَ بَيْنَكُمْ ؕ اَللّٰهُ رَبُّنَا وَرَبُّكُمْ ؕ لَنَآ اَعْمَالُنَا وَلَكُمْ اَعْمَالُكُمْ ؕ لَا حُجَّةَ بَيْنَنَا وَبَيْنَكُمْ ؕ اَللّٰهُ يَجْمَعُ بَيْنَنَا ۚ وَاِلَيْهِ الْمَصِيْرُ ﴿١٥﴾

तर आपण लोकांना याच्याचकडे बोलावित राहा. आणि जे काही आपणांस सांगण्यांत आले आहे, त्यावर दृढ (१५) जमून राहा. आणि त्यांच्या इच्छेवर चालूं नका. (१६) आणि सांगून द्या, अल्लाहतआलाने जेवढी पुस्तके अवतीर्ण केली आहेत, माझे त्यांच्यावर ईमान आहे. आणि मला हुकूम देण्यांत आला आहे की, तुमच्यात न्याय (१७) करीत रहावे. आमचा आणि तुम्हां सर्वांचा पालनकर्ता अल्लाहच आहे. आमची कर्मे आमच्यासाठी आहेत; आणि तुमची कर्मे तुमच्यासाठी आहेत. आमच्यांत व तुमच्यांत काही वाद नाही. (१८) अल्लाहतआला आम्हा सर्वांस एकत्र गोळा करील आणि त्याच्याचकडे परतून जाणे आहे. ⑮

१) म्हणजे त्याचा उपकार आहे की, तुमच्या जातीतूनच त्याने तुमची जोडपी बनविली; नाहीतर जर तुमच्या पत्न्या मनुष्याच्या ऐवजी, आणखी कोण्या सृष्टीपासून बनविल्या जातात, तर तुम्हाला हे सुख मिळाले नसते, जे आपल्याच जातीतील आणि आपल्याच चेहऱ्या मोहोऱ्याच्या पत्नीपासून मिळते.

२) म्हणजे हीच जोडपी बनविण्याची (पुल्लिंग व स्त्रीलिंग) शृंखला आम्ही, चतुष्पाद प्राण्यांमध्ये सुद्धा ठेवली आहे. चतुष्पादाने अभिप्रेत तेच नर आणि मादी आठ जनावरे आहेत. ज्याचा उल्लेख सू.अन्आम मध्ये करण्यांत आला आहे.

३) 'यज्‌रउ कुम्' चा अर्थ फैलाविणे किंवा निर्माण करण्याचे आहेत. म्हणजे तो तुम्हांस भरपूर फैलावित आहे. किंवा वंशपरत्वे वंश निर्माण करीत आहे, आणि चतुष्पादांच्या वंशाला सुद्धा. 'फिही' चा अर्थ आहे म्हणजे या जन्मण्यांत, या पद्धतीने तो तुम्हांस सुरवातीपासून निर्माण करीत आला आहे. किंवा ''गर्भाशयांत'' किंवा ''पोटांत'' अभिप्रेत आहे. किंवा

'फिही' 'बिही' च्या अर्थांत आहे. म्हणजे तुमचे जोडपे बनविण्याच्या सबबीने तुम्हाला निर्माण करतो किंवा फैलावित आहे. कारण की हे दांपत्य जीवनचे वंश पुढे चालविण्याला कारणीभूत आहे. (फत्हुल कदीर आणि इब्ने कसीर)
४) न जातीत न वैशिष्ट्यात. बस तो आपल्या सारखा आपणच आहे. एकटा आणि निरपेक्ष.
५) 'मकालीद' 'मिकलीद्' आणि मिकलादचे अनेकवचन आहे. म्हणजे खजीने किंवा किल्ल्या (चाव्या)
६) शरअचा अर्थ आहे, सांगितले, स्पष्ट केले, आणि निश्चित केले. 'लकुम्' (तुमच्या करीता) हे उम्मते मुहम्मदीयाला संबोधून आहे. अर्थ आहे की, तुमच्याकरीतां तोच धर्म निश्चित किंवा सांगितला गेला आहे ज्याची ताकीद याच्यापूर्वी तमाम पैगंबरांना केली जात राहिली आहे. या संदर्भात काही प्रतिष्ठीत पैगंबरांच्या नांवाचा उल्लेख करण्यांत आला.
७) 'अद्दीन' ने अभिप्रेत, अल्लाहवर ईमान, एकेश्वरवाद, पैगंबराचे आज्ञापालन, आणि अल्लाहच्या धर्मशास्त्राला मानणे आहे. सर्व पैगंबरांचा हाच धर्म होता. ज्याचे आवाहन ते आपआपल्या लोकांना करीत राहिले. जरी प्रत्येक पैगंबरांच्या धर्मशास्त्र आणि मार्गदर्शनमध्ये काही किरकोळ फरक असत. जसे की सांगितले, ''तुमच्यातून प्रत्येकाकरीता एक (धर्म) शास्त्र आणि मार्ग निश्चित करून दिला आहे.'' (सू.माइद : ४८) परंतु चर्चित तत्त्वे सर्वांच्या दर्म्यान सारखीच होती. याच गोष्टीला नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी या शब्दांत सांगितले आहे, ''आम्हा पैगंबराचा समूह अल्लाती भावाच्या (बाप एक आई वेगवेगळ्या) सारखा आहे, आमचा धर्म एक आहे.'' (स.बुखारी, वगैरे) आणि तो एक धर्म, तोच एकेश्वरवाद आणि पैगंबराचे आज्ञापालन करणे आहे. ज्यावर कुफ्र आणि ईमानाचा दारोमदार आहे.
८) फक्त एका अल्लाहची उपासना आणि त्याचे आज्ञापालन (किंवा त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन जे खरे म्हणजे अल्लाहचेच आज्ञापालन आहे.) (अल्लाहला) एक मानणे मतैक्याचा पाया आहे. आणि त्याची उपासना आणि आज्ञापालनापासून पळ काढणे, किंवा याच्यांत दुसऱ्यांना शामील करणे, मतभेद आणि वेगवेगळे होणे आहे. ज्यापासून फुट न टाकणे,सांगून मना केले गेले आहे.
९) आणि ते तेच एकेश्वरवाद आणि अल्लाह व रसूलचे आज्ञापालन आहे.
१०) म्हणजे ज्याला हिदायतला पात्र समजतो, त्याला हिदायतसाठी निवडून घेतो.
११) म्हणजे आपला धर्म अंगिकारण्याला आणि उपासनेला निव्वळ अल्लाहसाठीच करण्याची सुबुद्धी त्या मनुष्याला बहाल करतो, जो त्याचे आज्ञापालन व उपासनेकडे वळतो.
१२) म्हणजे त्यांनी मतभेद आणि फुटीचा मार्ग, ज्ञान म्हणजे हिदायत मिळाल्यानंतर आणि तर्क पूर्ण झाल्यानंतर, अंगीकारला. जेव्हांकी मतभेदाला काही सबब बाकी राहत नाही. परंतु निव्वळ द्वेष आणि अहंकार, हट्ट आणि मत्सर यामुळे असे केले. याच्याने काहींनी यहूदी आणि काहींनी मक्केचे कुरैश अभिप्रेत धरले आहेत.
१३) म्हणजे जर त्यांच्या बाबतीत शिक्षेमध्ये उशीराचा निर्णय, पहिल्यापासून नसता, तर लगेच शिक्षा पाठवून, त्यांना गारद करून टाकण्यांत आले असते.
१४) याच्याने अभिप्रेत यहूदी आणि ख्रिस्ती आहेत. जे आपल्या पूर्वींच्या लोकांनंतर पुस्तक म्हणजे तौरात व इंजील चे वारस बनविले गेले. किंवा अभिप्रेत अरब आहेत, ज्यांच्यात अल्लाहतआलाने आपले कुरआन अवतरीत केले. आणि त्यांना कुरआनाचा वारस बनविले. पहिल्या भावार्थाच्या अनुषंगाने 'अल्किताब' ने तौरात आणि इंजील, आणि दुसऱ्या भावार्थाच्या प्रमाणे त्यापासून अभिप्रेत कुरआन आहे.
१५) म्हणजे या फुट आणि संशयामुळे, ज्याचा उल्लेख पहिले केला गेला, आपण त्यांना एकेश्वरवादाचे आवाहन करावे आणि त्यावर दृढ रहावे.
१६) म्हणजे त्यांनी आपल्या इच्छेने ज्या गोष्टीं रचून घेतल्या आहेत, उदाहरणार्थ मूर्तींची उपासना वगैरे, याच्यात त्यांच्या इच्छेप्रमाणे चालू नका.
१७) म्हणजे जेव्हा कधी तुम्ही आपला कोणी मामला माझ्याजवळ आणाल तेव्हाअल्लाहच्या आदेशाप्रमाणे, याचा न्यायाने फैसला करीन.
१८) म्हणजे काही भांडण नाही, याकरीतां की सत्य जाहीर आणि स्पष्ट होऊन चुकले आहे.

وَالَّذِينَ يُحَاجُّونَ فِي اللَّهِ مِن بَعْدِ مَا اسْتُجِيبَ لَهُ حُجَّتُهُمْ دَاحِضَةٌ عِندَ رَبِّهِمْ وَعَلَيْهِمْ غَضَبٌ وَلَهُمْ عَذَابٌ شَدِيدٌ ﴿١٦﴾

**आणि जे लोक अल्लाहतआलाच्या गोष्टीत झगडतात, याच्यानंतर की पुष्कळसे लोक याला मानून चुकले,[१] यांचा वादविवाद अल्लाहजवळ निरर्थक आहे.[२] आणि त्यांच्यावर कोप आहे. आणि त्यांच्याकरीता कडक शिक्षा आहे. (१६)**

اللَّهُ الَّذِي أَنزَلَ الْكِتَابَ بِالْحَقِّ وَالْمِيزَانَ ۗ وَمَا يُدْرِيكَ لَعَلَّ السَّاعَةَ قَرِيبٌ ﴿١٧﴾

**अल्लाहतआलाने सत्यासह पुस्तक अवतीर्ण केले. आणि तराजू पण (उतारली आहे.)[३] आणि आपणांस काय ठाऊक की, कदाचित कयामत जवळच[४] आलेली असावी. (१७)**

يَسْتَعْجِلُ بِهَا الَّذِينَ لَا يُؤْمِنُونَ بِهَا ۖ وَالَّذِينَ آمَنُوا مُشْفِقُونَ مِنْهَا وَيَعْلَمُونَ أَنَّهَا الْحَقُّ ۗ أَلَا إِنَّ الَّذِينَ يُمَارُونَ فِي السَّاعَةِ لَفِي ضَلَالٍ بَعِيدٍ ﴿١٨﴾

**इची घाई पडली आहे जे तिला मानीत[५] नाही. आणि जे इच्यावर विश्वास ठेवतात ते तर इच्यापासून भयभित आहेत.[६] त्यांना इचे सत्य होण्याचे पूर्ण ज्ञान आहे. लक्षांत ठेवा जे लोक कयामतच्या मामल्यांत झगडत असतात,[७] ते फारच दुरच्या बहकण्यांत पडलेले आहेत.[८] (१८)**

اللَّهُ لَطِيفٌ بِعِبَادِهِ يَرْزُقُ مَن يَشَاءُ ۖ وَهُوَ الْقَوِيُّ الْعَزِيزُ ﴿١٩﴾

**अल्लाहतआला आपल्या सेवकांवर खुपच मेहेरबान आहे. ज्याला इच्छितो त्याला भरपूर अन्नसंपत्ती देतो. आणि तो मोठा बलवान आणि वर्चस्ववाला आहे. (१९)**

१) म्हणजे हे मुशरिक लोक मुसलमानांशी लढत झगडत राहतात. ज्यांनी अल्लाह व रसूलची गोष्ट मान्य करून घेतली आहे, कारण की त्यांना पुन्हा हिदायतच्या मार्गावरून हटवून द्यावे. किंवा अभिप्रेत यहूदी आणि ख्रिस्ती आहेत जे मुसलमानांशी झगडत असत. आणि म्हणत असत आमचा धर्म तुमच्या धर्मापेक्षा उत्तम आहे. आणि आमचा पैगंबर तुमच्या पैगंबरापूर्वी झालेला आहे. म्हणून आम्ही तुमच्या पेक्षा उत्तम आहोत.

२) 'दाहिजतून' चा अर्थ दुर्बल, निरर्थक होय.

३) 'अल्‌किताब' ने अभिप्रेत पुस्तक आहे. म्हणजे सर्व पैगंबरांवर जेवढी पुस्तके अवतीर्ण झाली. ती सर्व सत्य आणि खरी होती. किंवा विशेष करून कुरआन मजीद आहे; आणि त्याच्या सत्यतेला स्पष्ट केले जात आहे. तराजुने अभिप्रेत न्याय आहे. न्यायाला तराजुने यासाठी संबोधण्यात आले आहे की, ती समानता आणि न्यायाचे साधन आहे. याच्या मार्फतच लोकांच्या दर्म्यान समानता शक्य आहे. याच्या समान अर्थी ही महावाक्ये आहेत. ''खचित्‌च आम्ही आपल्या पैगंबरांना स्पष्ट प्रमाणे देऊन पाठविले. आणि त्यांच्या बरोबर पुस्तक आणि न्याय अवतीर्ण केले की लोकांनी न्यायावर कायम रहावे.'' (सू.हदीद-२५) ''त्यानेच आकाशाला उंच केले आणि त्यानेच तराजू ठेवली.'' जेणेकरून तुम्ही वजनात कमीजास्त न करावे. ''न्यायाने वजन ठिक ठेवा आणि वजनात कमी करू नका.'' (सू.रहमान-७-९)

४) 'करीबून' स्त्रीलिंग आणि पुल्लिंग उभंयतांच्या वैशिष्टांसाठी येऊन जातात.

५) म्हणजे उपहास म्हणून हे समजत होते की, ही कोठे येणार आहे? म्हणून म्हणतात की कयामतने लवकर यावे.

६) या करीता की एक तर त्यांना तिच्या घडून येण्याचा पूर्ण विश्वास आहे. दुसरे त्यांना भय आहे की, त्या दिवशी निपक्षपाती हिशेब होईल. कोठे ते सुद्धा अल्लाहच्या पकडीत न येऊन जावो! जसे दुसऱ्या ठिकाणी आहे, ''आणि जे लोक देतात, जे काही देतात. आणि त्यांची अंत:करणे थरथर कापतात, की, ते आपल्या पालनकर्त्याकडे परतून जाणार आहेत.'' (सू.मुअमिनून-६०)

७) ज्याचा अर्थ लढणे झगडणे आहे. किंवा 'मिरयतून' पासून आहे. शंका कुशंकेच्या अर्थात.

८) यासाठी की ते या प्रमाणावर चिंतन आणि मननच करीत नाहीत. जे ईमान आणण्याला कारणीभूत होऊ शकते. वास्तविक ही प्रमाणे रात्र दिवस त्यांच्या पाहण्यांत येतात. यांच्या नजरेस पडतात. आणि यांच्या समज आणि बुद्धीच्या आकलनांत येऊं शकतात. म्हणून ते सत्यापासून फार दूर जाऊन पडले आहेत.

مَنْ كَانَ يُرِيْدُ حَرْثَ الْاٰخِرَةِ نَزِدْ لَهٗ فِيْ حَرْثِهٖ ۚ وَمَنْ كَانَ يُرِيْدُ حَرْثَ الدُّنْيَا نُؤْتِهٖ مِنْهَا ۙ وَمَا لَهٗ فِي الْاٰخِرَةِ مِنْ نَّصِيْبٍ ﴿٢٠﴾

ज्याचा विचार परलोकाच्या शेतीचा असेल, आम्ही त्याला त्याच्या शेतीत आणखी बरकत देऊ. (१) आणि जो इहलोकाच्या शेतीचा इच्छुक असेल आम्ही त्याला याच्यातूनच काही देऊन टाकू. (२) अशा मनुष्याचा परलोकांत काही वाटा नाही. (३) (२०)

اَمْ لَهُمْ شُرَكٰٓؤُا شَرَعُوْا لَهُمْ مِّنَ الدِّيْنِ مَا لَمْ يَاْذَنْۢ بِهِ اللّٰهُ ۭ وَلَوْلَا كَلِمَةُ الْفَصْلِ لَقُضِيَ بَيْنَهُمْ ۭ وَاِنَّ الظّٰلِمِيْنَ لَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٢١﴾

काय या लोकांनी (अल्लाहचे) असे सरकतदार (निश्चित करून ठेवले) आहेत. ज्यांनी असे धर्माचे आदेश निश्चित करून ठेवले आहेत, जे अल्लाहने सांगितलेले नाहीत. (४) जर निर्णयाच्या दिवसाचे वचन नसते, तर (आतांच) यांच्यांत फैसला करून देण्यांत आला असता. खचित्‌च या आज्ञाभंजक लोकांकरताच दु:खदायक शिक्षा आहे. (२१)

تَرَى الظّٰلِمِيْنَ مُشْفِقِيْنَ مِمَّا كَسَبُوْا وَهُوَ وَاقِعٌۢ بِهِمْ ۭ وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ فِيْ رَوْضٰتِ الْجَنّٰتِ ۚ لَهُمْ مَّا يَشَاۗءُوْنَ عِنْدَ رَبِّهِمْ ۭ ذٰلِكَ هُوَ الْفَضْلُ الْكَبِيْرُ ﴿٢٢﴾

आपण पाहाल की हे जालीम लोक आपल्या कर्मांकडून भित असतील. (५) ज्यांचे दुष्परिणाम त्यांच्यावर घडून येणार आहे. (६) आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि त्यांनी चांगली कामे केली, ते स्वर्गांच्या बागात असतील. ते जे इच्छतील आपल्या पालनकर्त्याजवळ हजर पावतील. हीच तर मोठी कृपा आहे. (२२)

ذٰلِكَ الَّذِيْ يُبَشِّرُ اللّٰهُ عِبَادَهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ ۭ قُلْ لَّآ اَسْـَٔــلُكُمْ عَلَيْهِ اَجْرًا اِلَّا الْمَوَدَّةَ فِي الْقُرْبٰى ۭ وَمَنْ يَّقْتَرِفْ حَسَنَةً نَّزِدْ لَهٗ فِيْهَا حُسْنًا ۭ اِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ شَكُوْرٌ ﴿٢٣﴾

हे तेच आहे ज्याची खुषखबर अल्लाहतआला आपल्या सेवकांना देत आहे, ज्यांनी ईमान आणले आणि (सुन्नतप्रमाणे) सुकर्म केले. तर सांगून द्या की मी यावर तुमच्याकडून काही मोबदला इच्छीत नाही. पण आप्तसंबंधांचे (७) प्रेम, (मात्र) जो मनुष्य काही पुण्य करेल, आम्ही त्याच्यासाठी त्याच्या पुण्यांत, आणखी जास्त खुबी पैदा करू. (८) नि:संशय अल्लाहतआला फार क्षमाकर्ता आणि फारच गुणग्राहक (९) आहे. (२३)

اَمْ يَقُوْلُوْنَ افْتَرٰى عَلَي اللّٰهِ كَذِبًا ۚ فَاِنْ يَّشَاِ اللّٰهُ يَخْتِمْ عَلٰي قَلْبِكَ ۭ وَيَمْحُ اللّٰهُ الْبَاطِلَ وَيُحِقُّ الْحَقَّ بِكَلِمٰتِهٖ ۭ اِنَّهٗ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ﴿٢٤﴾

काय हे असे म्हणतात की, (पैगंबराने) अल्लाहवर खोटे कुभांड रचले आहे, जर अल्लाहतआला इच्छील तर तुमच्या अंत:करणावर मोहोर लावून टाकेल. (१०) आणि अल्लाहतआला आपल्या गोष्टींनी असत्याला मिटवून टाकतो. (११) आणि सत्य स्थापित करतो. तो अंत:करणातील गोष्टींना जाणणारा आहे. (२४)

وَهُوَ الَّذِيْ يَقْبَلُ التَّوْبَةَ عَنْ عِبَادِهٖ وَيَعْفُوْا عَنِ السَّيِّاٰتِ وَيَعْلَمُ مَا تَفْعَلُوْنَ ﴿٢٥﴾

तोच आहे जो आपल्या सेवकांचा पश्चात्ताप मान्य करतो. (१२) आणि पापांना क्षमा करतो. आणि जे काही तुम्ही करत आहात ते (सर्व) काही तो जाणतो (२५)

१) 'हरस' चा अर्थ येथे बी पेरण्याचा आहे. येथे हे कर्मांची फळे आणि फायद्यांच्या बाबतीत तुलनात्मक पद्धतीने सांगण्यांत आले आहे. अर्थ हा आहे की जो मनुष्य इहलोकांत आपल्या कर्म आणि कष्टांमार्फत परलोकाच्या प्रतिफळाचा इच्छुक आहे, तर अल्लाहतआला त्याच्या परलोकाच्या शेतीमध्ये अशाप्रकारे वाढ करून देईल की एक एक पुण्याचे प्रतिफळ दहा पटीपासून सातशे पटीपर्यंत, किंबहुना याच्यापेक्षा सुद्धा जास्त प्रदान करील.

२) म्हणजे इहलोकाच्या इच्छुकाला इहलोक तर मिळतो, परंतु एवढा नाही, जेवढी त्याची इच्छा असते. किंबहुना एवढीच मिळते जेवढी अल्लाहची मर्जी आणि त्याच्या दैवाप्रमाणे असते.

३) हा तोच विषय आहे जो सू.बनी इस्राईल आ.१८ मध्ये सुद्धा सांगण्यांत आला आहे. अर्थ हा आहे की इहलोक तर अल्लाहतआला प्रत्येकाला इतका अवश्य देतो, जेवढा त्याने लिहून दिला आहे कारण की त्याने प्रत्येकाच्या अन्नसंपत्तीची जबाबदारी घेतली आहे. इहलोकाच्या इच्छुकाला सुद्धा आणि परलोकाच्या इच्छुकाला सुद्धां. तथापि जो परलोकाचा इच्छुक असेल म्हणजे परलोकासाठी प्रयत्न आणि कष्ट करील, तर कयामतच्या दिवशी, 'अज्‌आफन्

मुजा अफा' पुण्यप्रतिफळ त्याला बहाल करील. जेव्हाकी, इहलोकाच्या इच्छुकाकरीता परलोकांत नरकाग्नीच्या शिक्षेशिवाय काहीही असणार नाही. आता हे मनुष्याला स्वत:च विचार करावयास पाहिजे की, त्याचा फायदा इहलोकाचा इच्छुक होण्यांत आहे की परलोकाचा इच्छुक होण्यात.

४) म्हणजे शिर्क आणि अपराध ज्यांचा हुकूम अल्लाहने दिला नाही, त्यांच्या बनविलेल्या सरकतदारांनी, मनुष्यांना या मार्गाला लावले आहे.

५) म्हणजे कयामतच्या दिवशी.

६) वास्तविक भिणे, फायदेकारक होणार नाही. कारण की आपल्या केल्याची शिक्षा तर कुठल्याही परिस्थितीत त्यांना भोगावी लागेल.

७) कुरैशची टोळी आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम यांच्या दर्म्यान आप्तसंबंध होते. महावाक्याचा अर्थ बिलकुल स्पष्ट आहे की, मी प्रवचन, उपदेश आणि प्रचार आणि निमंत्रणाचा काही मोबदला तुमच्याजवळ मागत नाही. तथापि एका गोष्टीची मागणी जरुर आहे की, माझ्या आणि तुमच्या दर्म्यान जो आप्तसंबंध आहे; त्याचा विचार करा; तुम्ही माझ्या निमंत्रणाला मानत नाही तर मानू नका, तुमची मर्जी, परंतु मला नुकसान पोहचविण्यापासून तर दूर राहा. तुम्ही माझे सहाय्यक आणि पक्ष घेणारे बनू शकत नाही तर आप्तसंबंधाच्या नात्याने मला इजा तर पोहचवूं नका. आणि माझ्या रस्त्यातील अडथळा तर बनूं नका की, मी पैगंबरीचे कर्तव्य पार पाडू न शकावे. ह.इब्ने अब्बास ﷺ नी याचा अर्थ केला आहे, माझ्या आणि तुमच्या दर्म्यान जो आप्तसंबंध आहे. त्याला कायम ठेवा. (स.बुखारी, तफसीर सू.शूरा) नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची संतती, खरोखरच, घराणे आणि वंशाच्या दृष्टीने जगातील अति प्रतिष्ठीत घराणे आहे. त्याच्याशी प्रेम, त्याचा आदर सन्मान, करणे ईमानाचा एक भाग आहे. म्हणून नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी सुद्धा हदीशीमध्ये, त्यांचा आदर सन्मान व संरक्षणाची ताकीद केली आहे. परंतु या महावाक्याचा काही संबंध, या विषयाशी नाही; जसे की, शिया लोक ओढाताण करून या महावाक्याला मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या संततीच्या प्रेमाबरोबर जोडतात. आणि संततीला सुद्धां त्यांनी मर्यादित करून टाकले आहे. ह.अली ﷺ ह.फातिमा ﷺ आणि हसन व हुसेन ﷺ पर्यंत. तसेच प्रेमाचा भावार्थ पण त्यांच्याजवळ हा आहे की, त्यांना निष्पाप आणि उपास्याच्या अधिकारांनी संपन्न मानले जावे. याशिवाय मक्केच्या काफिरांनी आपल्या घराण्याच्या प्रेमाची मागणी, प्रचाराचा मोबदला म्हणून फारच विचित्र गोष्ट आहे. जी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या उच्च शानच्या मुकाबल्यात फारच खालच्या दर्जाची आहे. मग हे महावाक्य आणि अध्याय मक्केत अवतीर्ण झाला आहे. जेव्हा की, ह.अली ﷺ आणि ह.फातमा ﷺ यांच्या दर्म्यान आजून विवाहसंबंध पण कायम झाला नव्हता. म्हणजे ते घराणे भूपृष्टावर अस्तित्वातच आले नव्हते. ज्याचा स्वत:च घडलेल्या प्रेमाचा आधार या महावाक्याकडून घेतला जातो.

८) म्हणजे मोबदला आणि पुण्य प्रतिफळामध्ये वाढ करू. किंवा पुण्याचा नंतर, त्याचा बदला आणखी पुण्य करण्याच्या सुबुद्धीच्या स्वरुपांत देऊ. ज्याप्रमाणे पापाचा बदला, आणखी जास्त पाप करणे आहे.

९) म्हणून तो त्यावर पांघरुण घालतो आणि क्षमा करून टाकतो. आणि जास्तीत जास्त पुण्य प्रतिफळ देतो.

१०) म्हणजे या आरोपांत काही सत्त्यता असती, तर आम्ही आपल्या अंत:करणावर मोहोर लावून दिली असती. ज्याच्याने ते कुरआनच गायब होऊन गेले असते, ज्याच्या रचण्याचा आरोप आपल्यावर करण्यांत येत आहे. अर्थ आहे की आम्ही आपणांस याची अति कडक शिक्षा देतो.

११) हे कुरआन पण जर निरर्थक असते (जसा की खोटे ठरवणाऱ्यांचा दावा आहे. ) तर खचित्च अल्लाहतआला त्याला पण मिटवून टाकतां. जशी की त्याची संवय आहे.

१२) तौबा चा अर्थ आहे, केलेल्या पाप कृत्यांवर पश्चात्ताप व्यक्त करणे, आणि पुढे याला न करण्याचा पक्का इरादा. निव्वळ तोंडाने तौबा तौबा करून घेणे किंवा या गुन्हा आणि पापाच्या कामाला न सोडणे आणि पश्चात्ताप व्यक्त करीत जाणे, तौबा करणे नाही. हा उपहास आणि थट्टा आहे. तथापि प्रांजळ आणि खरी तौबा, अल्लाहतआला खचित्च मान्य करतो.

وَيَسْتَجِيبُ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ وَيَزِيدُهُم مِّن فَضْلِهِ ۚ وَالْكَافِرُونَ لَهُمْ عَذَابٌ شَدِيدٌ ﴿٢٦﴾

**ईमानवाल्यांचे आणि सुकृत्ये करणाऱ्यांचे तो [१] ऐकतो. आणि त्यांना आपल्या कृपेने आणखी जास्त देतो. आणि काफिराकरीता कडक शिक्षा होणे आहे. (२६)**

وَلَوْ بَسَطَ اللَّهُ الرِّزْقَ لِعِبَادِهِ لَبَغَوْا فِي الْأَرْضِ وَلَٰكِن يُنَزِّلُ بِقَدَرٍ مَّا يَشَاءُ ۚ إِنَّهُ بِعِبَادِهِ خَبِيرٌ بَصِيرٌ ﴿٢٧﴾

**जर अल्लाहतआला आपल्या सर्व सेवकांची अन्नसंपत्ती वाढवून देता, तर त्यांनी मुलुखांत फिसाद [२] करून टाकला असता. परंतु एका अंदाजाने जे काही इच्छितो अवतरीत करतो. तो आपल्या सेवकांशी पूर्ण वाकब आणि खूप पाहणारा आहे. (२७)**

وَهُوَ الَّذِي يُنَزِّلُ الْغَيْثَ مِن بَعْدِ مَا قَنَطُوا وَيَنشُرُ رَحْمَتَهُ ۚ وَهُوَ الْوَلِيُّ الْحَمِيدُ ﴿٢٨﴾

**आणि तोच आहे, जो लोकांच्या निराश होऊन गेल्यानंतर, पाऊस वर्षवितो. [३] आणि आपली दया पसरुन देतो आणि तोच पुरस्कर्ता आणि स्तुतीस[४] पात्र आहे. (२८)**

وَمِنْ آيَاتِهِ خَلْقُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ وَمَا بَثَّ فِيهِمَا مِن دَابَّةٍ ۚ وَهُوَ عَلَىٰ جَمْعِهِمْ إِذَا يَشَاءُ قَدِيرٌ ﴿٢٩﴾

**आणि त्याच्या निशाण्यांमधून, आकाश आणि पृथ्वीची निर्मिती आहे. आणि त्यांच्या प्राण्यांचे पसरवून देणे आहे. तो या गोष्टीवर पण समर्थ आहे की, जेव्हा इच्छील त्यांना गोळा करून देईल. [५] (२९)**

وَمَا أَصَابَكُم مِّن مُّصِيبَةٍ فَبِمَا كَسَبَتْ أَيْدِيكُمْ وَيَعْفُو عَن كَثِيرٍ ﴿٣٠﴾

**तुमच्यावर जी काही संकटे येतात, ती तुमच्या हातांच्या कर्तृत्वाचा बदला आहे. आणि तो तर कित्येक गोष्टी क्षमा करून टाकतो. [६] (३०)**

१) म्हणजे त्यांच्या प्रार्थना ऐकतो. आणि त्यांची इच्छा आणि आकांक्षा पूर्ण करतो. या अटीवर की प्रार्थना करण्याच्या नियम आणि शर्तींचे पूर्ण पालन केले गेले असेल. आणि हदीसमध्ये येते की, ''अल्लाह आपल्या सेवकाच्या तौबाने, त्या मनुष्यापेक्षा सुद्धा जास्त खूष होतो, ज्याची स्वारी खाण्यापिण्याच्या सामानासह, वाळवंटात जंगलात हरवून जाईल. आणि तो निराश होऊन कोण्या झाडाखाली झोपून जाईल की अचानक त्याला आपली स्वारी भेटून जाईल. आणि अति आनंदाच्या भरांत त्याच्या तोंडू निघून जाईल, ''हे अल्लाह! तं माझा सेवक आणि मी तुझा पालनकर्ता म्हणजे अत्त्यानंदाने तो चूक करून जाईल.'' (स.मुस्लीम किताबुत् तौबा)

२) म्हणजे जर अल्लाहतआला प्रत्येक मनुष्याला आवश्यकतेपेक्षां जास्त, समान पद्धतीने अन्नसंपत्तीचे सामान देईल. तर त्याचा परिणाम हा झाला असतां, की कोणी कोणाच्या आधीनस्थ होण्याला मान्य केले नसते. प्रत्येक मनुष्य फिसादामध्ये, आज्ञाभंजन व शत्रुत्व करण्यांत, एकापेक्षां एक वरचढ राहिला असतां; ज्यामुळे पृथ्वी फिसादाने भरून गेली असती.

३) जो निरनिराळ्या प्रकारच्या अन्नसंपत्तीच्या निर्मितीमध्ये फायदेकारक आणि महत्त्वाचा आहे. हा पाऊस जेव्हां निराश झाल्यानंतर पडतो, तेव्हा या देणग्याची योग्य जाणीव सुद्धा त्याचवेळी होते. अल्लाहतआलाचे असे करण्यांत प्रयोजन सुद्धा हेच आहे की, सेवकांनी अल्लाहच्या देणग्यांची कदर करावी आणि त्याचे आभार मानावेत.

४) पुरस्कर्ता आहे. आपल्या सच्छील सेवकांची मदत करतो. त्यांना नफे बहाल करतो आणि त्यांना उपद्रव आणि गारद होण्यापासून त्यांचे संरक्षण करतो. आपल्या या अमर्याद बक्षिसे आणि भरपूर उपकारामुळे तो स्तुतीस पात्र आहे.

५) 'दाब्बतिन' (जमिनीवर चालणारा फिरणारा) चा शब्द सर्वसाधारण आहे. ज्यांच्यात जिन्न आणि मनुष्यांशिवाय, ते सर्व प्राणी शामील आहेत. ज्यांचे आकार, रंग, भाषा, स्वभाव आणि प्रकार व जाती, एक दुसऱ्यापासून बिल्कुल वेगळे आहेत. आणि ते जमिनीच्या पृष्ठभागावर पसरलेले आहेत. या सर्वांना अल्लाहतआला कयामतच्या दिवशी एकाच मैदानात गोळा करील.

६) यांचे संबोधन जर ईमानवाल्यांना असेल तर अर्थ होईल की, तुमच्या काही पापांचे प्रायश्चित्त तर ती संकटे बनून जातात, जी तुम्हाला गुन्ह्यांच्या परिणामांत पोहचतात. आणि काही गुन्हे ते आहेत, जे अल्लाहतआला असेच माफ करून टाकतो. आणि अल्लाहची जात मोठीच कृपाळूआहे. क्षमा केल्यानंतर परलोकांत याबाबतीत पकड करणार नाही. हदीसमध्ये सुद्धा येते की, ''ईमानवाल्यांना जो पण त्रास आणि दु:ख पोहचते, येथ पावेतो की, त्याच्या पायांत काटा पण टोचतो, तर अल्लाहतआला त्याच्यामुळे त्याचे गुन्हे क्षमा करून टाकतो.'' (स.बुखारी,स.मुस्लिम) जर संबोधन सर्वांसाठी असेल तर अर्थ होईल की, तुम्हास जगांत जी संकटे पोहोचतात, ती तुमच्या आपल्या गुन्ह्याचा परिणाम आहे. वास्तविक अल्लाहतआला तर पुष्कळशा गुन्ह्यांना तर क्षमा करून टाकतो. म्हणजे एक तर नेहमीसाठी क्षमा करून टाकतो. किंवा त्यांच्यावर लगेच शिक्षा देत नाही. (आणि शिक्षा व पकडीत ढील, ही पण एक प्रकारची माफीच आहे.) जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जर अल्लाहतआला लोकांच्या कर्तृत्वावर लगेच पकड सुरु करून देईल, तर जमिनीवर कोणी चालणारा सुद्धा बाकी राहणार नाही.'' (सू.फातिर-४५) याच भावार्थाचे महावाक्य सू.नहल-६१ पण आहे.

آणि तुम्ही आम्हांस पृथ्वीत जेर करू शकणार नाही. (१) तुमच्या करीतांअल्लाहतआला शिवाय कोणी पुरस्कर्ता आणि मददगार नाही. ३१

وَمَآ اَنْتُمْ بِمُعْجِزِيْنَ فِى الْاَرْضِ ۚۖ وَمَا لَكُمْ مِّنْ
دُوْنِ اللّٰهِ مِنْ وَّلِيٍّ وَّلَا نَصِيْرٍ ۝٣١

आणि समुद्रांत चालणारी पर्वतांसारखी गलबते, त्याच्या निशाण्यामधून आहेत (२) ३२

وَمِنْ اٰيٰتِهِ الْجَوَارِ فِى الْبَحْرِ كَالْاَعْلَامِ ۝٣٢

जर तो इच्छील तर वारा बंद करून टाकेल आणि ही गलबते समुद्रावर उभे राहून जातील. खचित्‌च याच्यात प्रत्येक सहनशिलता पत्करणाऱ्यासाठी आणि आभार मानणाऱ्यांसाठी निशाण्या आहेत. ३३

اِنْ يَّشَاْ يُسْكِنِ الرِّيْحَ فَيَظْلَلْنَ رَوَاكِدَ عَلٰى ظَهْرِهٖ ؕ
اِنَّ فِىْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّكُلِّ صَبَّارٍ شَكُوْرٍ ۝٣٣

किंवा त्यांना त्यांच्या कर्तृत्वामुळे नाश करून टाकेल. (३) तो तर पुष्कळशा कसूर करणाऱ्यांना क्षमा करून टाकतो. (४) ३४

اَوْ يُوْبِقْهُنَّ بِمَا كَسَبُوْا وَيَعْفُ عَنْ كَثِيْرٍ ۝٣٤

आणि जे लोक आमच्या निशाण्यांमध्ये झगडतात, (५) त्यांनी जाणून घ्यावे की त्यांना काही सुटका नाही. (६) ३५

وَّيَعْلَمَ الَّذِيْنَ يُجَادِلُوْنَ فِىْٓ اٰيٰتِنَا ؕ مَا لَهُمْ مِّنْ
مَّحِيْصٍ ۝٣٥

तर तुम्हांस जे काय दिले गेले आहे तो इहलौकीक आयुष्याचा काही असाच (७) सामान आहे; आणि अल्लाहजवळ जे आहे, ते याहून फारच उत्तम आणि चिरस्थायी आहे. (८) ते त्यांच्याकरीतांआहे ज्यांनी ईमान आणले. आणि फक्त आपल्या पालनकर्त्यावरच भरंवसा ठेवतात ३६

فَمَآ اُوْتِيْتُمْ مِّنْ شَيْءٍ فَمَتَاعُ الْحَيٰوةِ الدُّنْيَا ۚ وَمَا
عِنْدَ اللّٰهِ خَيْرٌ وَّاَبْقٰى لِلَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَلٰى رَبِّهِمْ
يَتَوَكَّلُوْنَ ۝٣٦

आणि मोठया गुन्ह्यापासून आणि निर्लज्ञपणापासून वाचतात आणि राग आला असतां सुद्धा क्षमा करून टाकतात (९) ३७

وَالَّذِيْنَ يَجْتَنِبُوْنَ كَبٰٓئِرَ الْاِثْمِ وَالْفَوَاحِشَ وَاِذَا
مَا غَضِبُوْا هُمْ يَغْفِرُوْنَ ۝٣٧

आणि आपल्या पालनकर्त्याची आज्ञा पाळतात. (१०) आणि नमाज कायम करतात. (११) आणि त्याचे (प्रत्येक) काम आपसातील सल्लामसलतीने होते. (१२) आणि जे आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे, त्याच्यातून (आमच्या नांवावर) देतात ३८

وَالَّذِيْنَ اسْتَجَابُوْا لِرَبِّهِمْ وَاَقَامُوا الصَّلٰوةَ ۪ وَاَمْرُهُمْ
شُوْرٰى بَيْنَهُمْ ۪ وَمِمَّا رَزَقْنٰهُمْ يُنْفِقُوْنَ ۝٣٨

आणि जेव्हां यांच्यावर जुलूम (आणि अत्याचार) होतो, तेव्हा ते फक्त बदला घेतात. (१३) ३९

وَالَّذِيْنَ اِذَآ اَصَابَهُمُ الْبَغْيُ هُمْ يَنْتَصِرُوْنَ ۝٣٩

आणि वाईटाचा बदला, अशाच सारख्या वाईटाने आहे. (१४) आणि जो क्षमा करून टाकेल आणि सुधारणा करील, त्याचे प्रतिफळ अल्लाहवर आहे. नि:संशय अल्लाहतआला जुलूम करणाऱ्यांस दोस्त ठेवीत नसतो. ४०

وَجَزٰٓؤُا سَيِّئَةٍ سَيِّئَةٌ مِّثْلُهَا ۚ فَمَنْ عَفَا وَاَصْلَحَ
فَاَجْرُهٗ عَلَى اللّٰهِ ؕ اِنَّهٗ لَا يُحِبُّ الظّٰلِمِيْنَ ۝٤٠

१) म्हणजे तुम्ही पळून कोण्या अशा जागी जाऊ शकत नाही, की जेथे तुम्ही आमच्या पकडीत येऊ शकणार नाही. किंवा जे संकट आम्ही तुमच्यावर अवतरीत करावयाचे इच्छू. त्यापासून तुम्ही वाचून जाल.

२) अलजेवार, किंवा अलजवारी, जारियतुम (चालणारी) चे अनेकवचन आहे. म्हणजे नावा, जहाज. म्हणजे जमिनीवर व समुद्रांत. हे अल्लाहतआलाच्या असीम सामर्थ्याचे प्रमाण आहे की, समुद्रामध्ये पर्वतासारखी गलबते त्याच्या हुकुमाने चालतात. नाही तर जर तो हुकूम देईल तर हे समुद्रांतच उभे राहतील.

३) म्हणजे समुद्राला हुकूम देईल आणि याच्या लाटा क्रौर्यरुप धारण करतील आणि हे त्यांच्यात बुडून जातील.

४) नाही तर समुद्रामध्ये प्रवास करणारा कोणी पण सही सलामत परत येऊ शकणार नाही.

५) म्हणजे याचा इनकार करतात.

६) म्हणजे अल्लाहच्या शिक्षेपासून तो कोठे पळून जाऊन सुटका करून घेऊ शकत नाही.

७) म्हणजे सामान्य आणि क्षुल्लक आहे, मग तो कारूनचा खजानाच का असेना! म्हणून याच्या धोक्यात फसू नये. यासाठी की हे तात्पुरते आणि क्षणभंगुर आहे.

८) म्हणजे पुण्याचा जो मोबदला आणि प्रतिफळ, अल्लाहच्या जवळ मिळेल ते ऐहिक साज सामानाच्या किती तरी जास्त उत्तम पण आहे, आणि चिरस्थायी सुद्धां. कारण की त्याला ऱ्हास आणि नष्ट होणे नाही. अर्थ आहे की, इहलोकाला परलोकावर प्राधान्य देऊं नका. असे कराल तर पश्चात्ताप पावाल.
९) म्हणजे लोकांना क्षमा करणे हा त्यांच्या प्रकृती आणि स्वभावाचा भाग आहे, न की, सूड उगविणे आणि बदला घेणे. ज्याप्रमाणे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत येते, ''म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी आपल्या स्वत:करीता कधी बदला घेतला नाही. परंतु अल्लाहतआलाच्या मर्यादा तोडल्या जाणे आपल्यासाठी सहन करण्यासारखे नव्हते.'' (स.बुखारी, स.मुस्लिम)
१०) म्हणजे त्याच्या आज्ञेचे पालन, त्याच्या पैगंबराचे अनुकरण, आणि त्याच्या मना केलेल्यापासून आपला बचाव करतात.
११) नमाजची नित्यता आणि तिला कायम करणे, याचा खास म्हणून उल्लेख केला. की उपासनांमध्ये इचे महत्त्व सर्वांत जास्त आहे.
१२) शूरा म्हणजे ईमानवाले प्रत्येक महत्त्वाचे काम, आपसांतील सल्लामसलतने करतात. आपल्याच मताला शेवटचा शब्द समजत नाही. स्वत: नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला पण अल्लाहने हुकूम दिला की, मुसलमानांशी सल्ला मसलत करा. (सू.आले इमरान - १५९) म्हणून आपण ﷺ युद्ध विषयक मामल्यांत, आणि दुसऱ्या महत्त्वाच्या कामांत, सल्लामसलत करण्याची काळजी घेत. ज्यामुळे मुसलमानांचे पण धाडस बांधले जाई, आणि प्रकरणाचे वेगवेगळे पैलू स्पष्ट होऊन जात. ह.उमर ﷺ जेव्हा भाल्याच्या वाराने जखमी झाले, आणि जीवनाची काही आशा बाकी राहिली नाही. तेव्हा खिलाफतच्या बाबतीत सल्ला मसलतीसाठी, सहा माणसे ठरवून दिलीत. उस्मान, अली, तलहा, जुबैर सअ्द आणि अब्दुर्रहमान बिन औफ रजी अल्लाह अन्हुम. त्यांनी आपसांत सल्ला मसलत केली. आणि लोकांशी पण सल्ला मसलत केली. आणि याच्यानंतर ह.उस्मान ﷺ ला खिलाफतीसाठी नक्की करून टाकले. काही लोक सल्लामसलतीच्या या हुकूम आणि ताकीदीला, राजेशाहीचे खंडन आणि लोकशाहीचा आधार समजत. वास्तविक सल्लामसलतीची व्यवस्था राजेशाहीमध्ये सुद्धा होत असते. बादशाहची पण सल्लामसलत समिती असते. जिच्यांत प्रत्येक महत्त्वाच्या प्रकरणांत विचार विनिमय होतो. म्हणून या महावाक्याने राजेशाहीचे खंडन अजिबात होत नाही. याशिवाय लोकशाहीला सल्लामसलती सारखे समजणे, एकदम चुकीचे आहे. सल्लामसलत प्रत्येकाच्या मनासारखी होऊं शकत नाही. न तर त्याची आवश्यकताच आहे. सल्ला मसलतीचा अर्थ त्या लोकांशी सल्लामसलत करणे आहे, जे या मामल्यांच्या बारकाव्यांना आणि आवश्यकतेला समजतात, ज्यांत सल्ला मसलत करावयाची आहे. जसे बिल्डींग, पुल वगैरे बनवण्याचे असेल तर, कोण्या टांगेवाल्याला, शिंपी किंवा रिक्षा ड्रायव्हरशी नाही, कोण्या इंजीनीयरशी सल्ला मसलत केली जाईल. कोण्या आजाराबाबत सल्ला मसलतची आवश्यकता असेल तर वैद्यक शास्त्राच्या तज्ज्ञाकडे पाठविले जाईल. जेव्हांकी लोकशाही मध्ये, याच्या उलट प्रत्येक वयांत आलेल्या माणसाला सल्ला मसलतीला योग्य समजण्यांत येते. मग जरी तो निरक्षर, समज नसलेला आणि राज्याच्या कामांच्या बारकाव्यांकडून एकदम अजाण असेल. याशिवाय सल्लामसलतीच्या शब्दाने लोकशाहीचा आधार, तानाशाही आणि गोंधळाशिवाय काही नाही. आणि ज्याप्रमाणे समाजवादाबरोबर इस्लामीचा शब्द लावल्याने, समाजवाद इस्लामला मान्य आहे, असे होऊं शकत नाही. अशाचप्रकारे ''लोकशाही'' मध्ये इस्लामीचे ठिगळ लावल्याने, पश्चिमी लोकशाहीवर खिलाफतचा कोट घालणे, योग्य होऊं शकत नाही. पश्चिमेचे हे खोटे रोपटे, इस्लामच्या भूमीवर वाढू शकत नाही.
१३) म्हणजे बदला घेण्यांस ते असमर्थ नाही. जर बदला घेऊं इच्छील तर घेऊं शकतात. तथापि सामर्थ्य असून सुद्धां, ते क्षमा करण्याला प्राधान्य देतात. जसे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी मक्केच्या विजयाच्या दिवशी, आपल्या रक्ताच्या तान्हेल्याकरीतां, सर्वांना क्षमा करून टाकल्याची घोषणा केली. हुदैबिया मध्ये, आपण ﷺ नी त्या ८० लोकांना क्षमा करून टाकले, ज्यांनी आपल्या विरूद्ध कारस्थान रचले होते. लबीद बिन आसिम यहूदीकडून बदला घेतला नाही. ज्याने आपल्यावर जादू केला होता. त्या यहूदी स्त्रीला आपण काहीच म्हटले नाही, जिने आपल्या जेवणांत विष मिसळवून दिले होते. ज्याचा त्रास आपल्याला शेवटच्या श्वासापर्यंत जाणवत होता. सल्लल्लाहु अलैहि व सल्लम (इब्ने कसीर)
१४) हा 'किसास' (बदला घेण्या) ची परवानगी आहे. वाईटाचा बदला जरी वाईटाने नाही, तरी साम्यामुळे त्यालाही वाईटच म्हणण्यांत आले आहे.

وَلَمَنِ انْتَصَرَ بَعْدَ ظُلْمِهٖ فَاُولٰٓئِكَ مَا عَلَيْهِمْ مِّنْ سَبِيْلٍ ﴿٤١﴾

आणि जो मनुष्य आपल्यावर जुलूम झाल्यानंतर (बरोबरीचा) बदला घेऊन घेईल, तर अशा लोकांवर (आरोप ठेवण्याचा) कोणी मार्ग नाही. (४१)

اِنَّمَا السَّبِيْلُ عَلَى الَّذِيْنَ يَظْلِمُوْنَ النَّاسَ وَيَبْغُوْنَ فِى الْاَرْضِ بِغَيْرِ الْحَقِّ ۚ اُولٰٓئِكَ لَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿٤٢﴾

हा मार्ग फक्त त्या लोकांकरीता आहे, जे स्वत: दुसऱ्यांवर जुलूम करतील, आणि मुलुखांत नाहक फिसाद करीत फिरतील. हेच लोक आहेत ज्यांच्याकरीता दु:खदायक शिक्षा आहे. (४२)

وَلَمَنْ صَبَرَ وَغَفَرَ اِنَّ ذٰلِكَ لَمِنْ عَزْمِ الْاُمُوْرِ ﴿٤٣﴾

आणि जो मनुष्य सहन करील आणि क्षमा करील; तर खचितच हे मोठ्या हिंमतीच्या कामामधून (एक काम) आहे. (४३)

وَمَنْ يُّضْلِلِ اللّٰهُ فَمَا لَهٗ مِنْ وَّلِيٍّ مِّنْۢ بَعْدِهٖ ۗ وَتَرَى الظّٰلِمِيْنَ لَمَّا رَاَوُا الْعَذَابَ يَقُوْلُوْنَ هَلْ اِلٰى مَرَدٍّ مِّنْ سَبِيْلٍ ﴿٤٤﴾

आणि ज्याला अल्लाहतआला बहकवून टाकील, त्याचा याच्यानंतर कोणी वाली व मददगार नाही. आणि तू पाहशील की जालीम लोक शिक्षांना पाहून म्हणत असतील की काय परतून जाण्याचा पण कोणी मार्ग आहे ? (४४)

وَتَرٰىهُمْ يُعْرَضُوْنَ عَلَيْهَا خٰشِعِيْنَ مِنَ الذُّلِّ يَنْظُرُوْنَ مِنْ طَرْفٍ خَفِيٍّ ۗ وَقَالَ الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِنَّ الْخٰسِرِيْنَ الَّذِيْنَ خَسِرُوْٓا اَنْفُسَهُمْ وَاَهْلِيْهِمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ ۗ اَلَآ اِنَّ الظّٰلِمِيْنَ فِيْ عَذَابٍ مُّقِيْمٍ ﴿٤٥﴾

आणि तू त्यांना पाहशील, की ते (नरकाग्नीच्या) समोर आणून उभे केले जातील. हीनत्वामुळे नमलेले असतील आणि खाली झुकलेल्या डोळ्यांनी कोपऱ्यातून पहात असतील, ईमानवाले म्हणतील खरोखर हानी भोगणारे ते आहेत ज्यांनी आज कयामतच्या दिवशी आपल्या स्वत:ला आणि आपल्या कुटुंबियांना नुकसानांत टाकले. लक्षांत ठेवा की खचितच जुलमी लोक नेहमीसाठी शिक्षेत आहेत. (१) (४५)

وَمَا كَانَ لَهُمْ مِّنْ اَوْلِيَآءَ يَنْصُرُوْنَهُمْ مِّنْ دُوْنِ اللّٰهِ ۗ وَمَنْ يُّضْلِلِ اللّٰهُ فَمَا لَهٗ مِنْ سَبِيْلٍ ﴿٤٦﴾

त्यांचे कोणी मददगार नाहीत. जे अल्लाहतआला शिवाय त्यांची मदत करूंशकतील. आणि ज्याला अल्लाह आडमार्गी भटकवून देईल, त्याच्यासाठी कोणी मार्गच नाही. (४६)

اِسْتَجِيْبُوْا لِرَبِّكُمْ مِّنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِيَ يَوْمٌ لَّا مَرَدَّ لَهٗ مِنَ اللّٰهِ ۗ مَا لَكُمْ مِّنْ مَّلْجَاٍ يَّوْمَئِذٍ وَّمَا لَكُمْ مِّنْ نَّكِيْرٍ ﴿٤٧﴾

आपल्या पालनकर्त्याचा हुकूम मानून घ्या. याच्यापूर्वी की अल्लाहकडून तो दिवस येऊन जावा त्याचे टळून जाणे अशक्य (२) आहे; तुम्हास त्या दिवशी न तर कोठे आश्रयाची जागा भेटेल न लपून अनोळखी होण्याची (३) (४७)

१) म्हणजे जगांत हे काफिर आम्हांस मूर्ख आणि ऐहिक नुकसानवाले समजत होते; जेव्हांकी आम्ही इहलोकांत फक्त परलोकाला प्राधान्य देत होतो. आणि ऐहिक तोट्याला काही महत्त्व देत नव्हतो. आज पाहून घ्या खरोखर कुणाचे नुकसान झाले आहे. ते ज्यांनी इहलोकाच्या तात्पुरत्या नुकसानाला दृष्टीआड करून दिले होते, आणि आज ते स्वर्गाचा आनंद उपभोगत आहे. किंवा ते ज्यांनी इहलोकालाच सर्व काही समजून ठेवले होते, आणि आज असे शिक्षेत ग्रस्त आहेत, ज्यापासून आता सुटका शक्यच नाही.

२) म्हणजे ज्याला रद्द करण्याचे आणि टाळण्याचे सामर्थ्य कोणी बाळगणार नाही.

३) म्हणजे तुमच्यासाठी कोणी असे ठिकाण नाही की ज्यात लपून तुम्ही अनोळखी होऊन जाल आणि ओळखले जाऊ शकूं नये. किंवा दृष्टीस पडूंशकूं नये. जसे फर्माविले, ''त्या दिवशी मनुष्य म्हणेल, कोठे पळून जाण्याची जागा आहे? मुळीच नाही ! कोठेच पळून जाण्याचा मार्ग नसेल. त्या दिवशी तुझ्या पालनकर्त्याजवळच ठिकाण असेल.'' (सू.कियामा - १०/१२) किंवा नकीर इनकार करण्याच्या अर्थांत आहे की तुम्ही आपल्या गुन्ह्यांना नाकारूंशकणार नाही. कारण एक तर ते सर्व लिहलेले असतील. दुसरे, स्वत: माणसाचे अवयव पण साक्ष देतील. किंवा जी शिक्षा तुम्हांस तुमच्या गुन्ह्यामुळे दिली जाईल, त्या शिक्षेला नाकारूंशकणार नाही; कारण की गुन्ह्यांना मान्य केल्याशिवाय तुम्हाला गत्यंतरच राहणार नाही.

فَاِنۡ اَعۡرَضُوۡا فَمَاۤ اَرۡسَلۡنٰكَ عَلَيۡهِمۡ حَفِيۡظًا ؕ اِنۡ
عَلَيۡكَ اِلَّا الۡبَلٰغُ ؕ وَاِنَّاۤ اِذَاۤ اَذَقۡنَا الۡاِنۡسَانَ مِنَّا
رَحۡمَةً فَرِحَ بِهَا ۚ وَاِنۡ تُصِبۡهُمۡ سَيِّئَةٌ ۢ بِمَا قَدَّمَتۡ
اَيۡدِيۡهِمۡ فَاِنَّ الۡاِنۡسَانَ كَفُوۡرٌ ﴿۴۸﴾

जर हे तोंड फिरवून घेतील, तर आम्ही आपणांस यांच्यावर काही रखवालदार करून तर पाठविले नाही. आपल्यावर तर फक्त संदेश पोहचवून देणे आहे. [१] आम्ही जेव्हा कधी मनुष्याला आपल्या दयेची गोडी चाखवून [२] देतो, तर तो त्याच्यावर ऐट दाखवितो. [३] आणि जर त्यांना त्यांच्या कर्मांच्या कारणाने कोणी आपत्ती [४] पोहचते, तर मनुष्य फारच कृतघ्न आहे. [५] (४८)

لِلّٰهِ مُلۡكُ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ ؕ يَخۡلُقُ مَا يَشَآءُ ؕ يَهَبُ
لِمَنۡ يَّشَآءُ اِنَاثًا وَّيَهَبُ لِمَنۡ يَّشَآءُ الذُّكُوۡرَ ﴿۴۹﴾

आकाश आणि पृथ्वीचे राज्य अल्लाहचेच आहे, तो जे इच्छितो निर्माण करतो. [६] ज्याला इच्छितो मुली देतो. आणि ज्याला इच्छितो मुलगे देतो. (४९)

اَوۡ يُزَوِّجُهُمۡ ذُكۡرَانًا وَّاِنَاثًا ۚ وَيَجۡعَلُ مَنۡ يَّشَآءُ
عَقِيۡمًا ؕ اِنَّهٗ عَلِيۡمٌ قَدِيۡرٌ ﴿۵۰﴾

किंवा त्यांना जमा करून देतो. [७] मुलगे सुद्धाआणि मुली सुद्धा. आणि ज्याला इच्छितो बांझ करून देतो. तो मोठा ज्ञानी आणि परम समर्थ आहे. (५०)

وَمَا كَانَ لِبَشَرٍ اَنۡ يُّكَلِّمَهُ اللّٰهُ اِلَّا وَحۡيًا اَوۡ مِنۡ
وَّرَآئِ حِجَابٍ اَوۡ يُرۡسِلَ رَسُوۡلًا فَيُوۡحِىَ بِاِذۡنِهٖ
مَا يَشَآءُ ؕ اِنَّهٗ عَلِىٌّ حَكِيۡمٌ ﴿۵۱﴾

अशक्य आहे की, कोण्या सेवकाशी अल्लाहतआला संभाषण करील परंतु 'वह्य' म्हणून, किंवा पडद्याच्या आडून, किंवा कोणी देवदुताला पाठवील आणि तो अल्लाहच्या हुकुमाने जे तो इच्छील, 'वह्य' [८] करील. नि:संशय तो महीमाशाली आहे, बुद्धीमान आहे. (५१)

وَكَذٰلِكَ اَوۡحَيۡنَاۤ اِلَيۡكَ رُوۡحًا مِّنۡ اَمۡرِنَا ؕ مَا كُنۡتَ
تَدۡرِىۡ مَا الۡكِتٰبُ وَلَا الۡاِيۡمَانُ وَلٰكِنۡ جَعَلۡنٰهُ
نُوۡرًا نَّهۡدِىۡ بِهٖ مَنۡ نَّشَآءُ مِنۡ عِبَادِنَا ؕ وَاِنَّكَ
لَتَهۡدِىۡۤ اِلٰى صِرَاطٍ مُّسۡتَقِيۡمٍ ﴿۵۲﴾

आणि अशाच प्रकारे आम्ही आपल्याकडे आपल्या हुकूमाने आत्म्याला उतारले [९] आहे; आपण याच्यापूर्वी हे पण जाणत नव्हते की, पुस्तक आणि ईमान काय वस्तू आहे? [१०] परंतु त्याला प्रकाश बनविले; त्याच्या मार्फत आपल्या सेवकांमधून, ज्याला इच्छितो त्याला हिदायत देतो. [११] नि:संशय आपण सरळमार्गाकडे मार्गदर्शन करीत आहांत (५२)

صِرَاطِ اللّٰهِ الَّذِىۡ لَهٗ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الۡاَرۡضِ ؕ ٥ ع ١٠ ٦
اَلَاۤ اِلَى اللّٰهِ تَصِيۡرُ الۡاُمُوۡرُ ﴿۵۳﴾

५ रु १० ६ त्या अल्लाहच्या मार्गाचे, [१२] ज्याच्या मालकीत आहे, जे काही आकाशांत आणि पृथ्वीत आहे. लक्षांत ठेवा ! सर्व कामे अल्लाहकडेच परतविली जातात [१३] (५३)

१) जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''त्यांना हिदायतवर आणून उभे करणे, तुझी जबाबदारी नाही. परंतु हिदायत अल्लाहतआला देतो, ज्याला इच्छितो.'' (सू.बकर:२७२) ''तर आपल्यावर फक्त पोहचवून देणेच आहे; हिशेब घेणे तर आम्हांवरच आहे.'' (सू.रअद-४०) ''आपण फक्त उपदेश करणारे आहात. आपण काही त्यांच्यावर दारोगा नाहीत.'' (सू.गाशिय:२२) या सर्वांचा अर्थ हा आहे की, आपण ﷺ ची जबाबदारी फक्त आणि फक्त ही आहे की, अल्लाहचा संदेश लोकांपर्यंत पोहचवून द्यावा. त्यांनी मानावा किंवा मानू नये, यांची विचारपूस आपल्याला होणार नाही; कारण की हिदायत देणे आपल्या अखत्यारात नाही. हे फक्त अल्लाहच्या अखत्यारात आहे.

२) म्हणजे अन्नसंपत्तीच्या साहित्याची विपुलता, तंदुरुस्ती आणि क्षेमकुशल, भरपुर संतती, मानमर्तबा आणि अधिकारपदे वगैरे.

३) म्हणजे गर्व आणि अहंकाराला जाहीर करतो. नाहीतर अल्लाहच्या देणग्यांवर खूष होणे किंवा त्यांना जाहीर करणे, नापसंत गोष्ट नाही. परंतु देणगी बद्दल बोलणे, आभार म्हणून असावे न की गर्व, लोकांना दाखविणे आणि अहंकार म्हणून.

४) संपत्तीची कमतरता, आजारपण आणि संततीपासून वंचित होणे, वगैरे.

५) म्हणजे लगेच देणग्यांना पण विसरुन जातो. आणि दात्याला सुद्धा. हे मनुष्याच्या जास्त बहुसंख्येच्या अनुषंगाने आहे, ज्याच्यांत दुर्बल ईमानवाले पण शामील आहेत. परंतु अल्लाहचे पुण्यवान सेवक आणि परिपूर्ण ईमानवाल्यांची

स्थिती अशी नसते; ते त्रासांमध्ये सहन करता, आणि देणग्यांवर आभार मानता.

६) म्हणजे ब्रम्हांडात फक्त अल्लाहचीच मर्जी आणि त्याचे नियोजन चालते. तो जे इच्छितो, ते होते. जे इच्छित नाही, ते होत नाही. कोणी दुसरा याच्यांत ढवळाढवळ करण्याचे सामर्थ्य आणि अधिकार बाळगत नाही.

७) म्हणजे ज्याला इच्छितो दोन्ही, मुलगे आणि मुली देतो. किंवा पुरुष आणि स्त्री मिळून दांपत्य बनवून देतो. याठिकाणी अल्लाहने लोकांचे चार प्रकार सांगितले आहेत. एक ते ज्यांना फक्त मुलगे, दिले, दुसरे ज्यांना फक्त मुली, तिसरे ते ज्यांना मुलगे मुली दोन्ही आणि चवथे ते ज्यांना न मुलगा न मुलगी लोकांच्या दर्म्यान हा फरक आणि भेद, अल्लाहच्या सामर्थ्यांच्या निशाण्यांमधून आहे. अल्लाहकडून असणाऱ्या या भेदाभेदाला, जगातील कोणतीही शक्ती, बदलण्यास समर्थ नाही. ही वाटणी संततीच्या अनुषंगाने आहे. बापांच्या अनुषंगाने सुद्धां, मनुष्यांचे चार प्रकार आहे.

> १) आदम (अ.) ला फक्त मातीपासून निर्माण केले यांचे न वडील आहेत, न आई. (२) ह.हव्वाला आदमपासून म्हणजे पुरुषापासून निर्माण केले. त्यांची आई नाही. (३) ह.ईसा (अ.) ला फक्त स्त्रीच्या शरीरापासून निर्माण केले; त्याचे वडील नाहीत. (४) आणि बाकी सर्व मनुष्यांना, पुरुष आणि स्त्री दोघांच्या मिलनाने. यांचे वडील पण आहेत आणि आईसुद्धा. फसुबहानल्लाहिल् अलीमुल कदीर. (इब्ने कसीर)

८) या महावाक्यामध्ये अल्लाहच्या वह्याचे तीन स्वरुप सांगण्यांत आले आहेत. पहिले हे की, अंत:करणांत कोण्या गोष्टीला टाकून देणे. किंवा स्वप्नात दाखवून देणे, या भरवंशासह की हे अल्लाहकडूनच आहे. दुसरे पडद्याआडून संभाषण करणे. जसे ह.मूसा ﷤ शी तूर पर्वतावर केले गेले. तिसरे, देवदुतांमार्फत आपले वह्य पाठविणे. जसे जिब्रईल ﷤ येत, आणि अल्लाहचा संदेश पैगंबरांना ऐकवित राहिले.

९) 'रूह' ने अभिप्रेत कुरआन आहे. म्हणजे ज्याप्रमाणे तुमच्यापूर्वी आणखी पैगंबरावर आम्ही वह्य करीत राहिलो, अशाच प्रकारे आम्ही आपल्यावर कुरआनाचे वह्य केले आहे. कुरआनाला आत्म्याने यासाठी संबोधित करण्यांत आले आहे की, कुरआनाने अंत:करणांना जीवन प्राप्त होते. जसे आत्म्यांत मानवी जीवनाचे रहस्य लपलेले आहे.

१०) पुस्तकाने अभिप्रेत कुरआन आहे. म्हणजे पैगंबरीपूर्वी कुरआनाचे काही ज्ञान आपणांस नव्हते. आणि अशाच प्रकारे ईमानचे त्या प्रत्येक माहितीपासून पण आपण ﷺ अजाण होते, जे धर्मशास्त्रांत वांच्छनीय आहे.

११) म्हणजे कुरआनाला प्रकाश बनविले; याच्यामार्फत आपल्या सेवकांमधून आम्ही ज्यांना इच्छितो, हिदायत बहाल करतो. अर्थ हा आहे की, कुरआनाने हिदायत आणि मार्गदर्शन त्यांनाच मिळते, ज्यांच्यात ईमानाची आकांक्षा आणि. तडफ असते. ते त्याला हिदायत मिळावी या इच्छेने वांचतात; ऐकतात आणि त्यावर चिंतन आणि मनन करतात. म्हणून अल्लाह त्यांची मदत करतो. आणि हिदायतचा मार्ग त्यांच्यासाठी प्रशस्त करुन देतो. ज्यावर ते चालू लागतात. नाही तर जो आपले डोळेच झांकून घेईल, कानांत बोळे घालून घेईन आणि बुद्धी आणि समजशक्तीपासून काम घेणार नाही तर त्यांना हिदायत का म्हणून लाभावी? जसे सांगितले, ''आपण सांगून टाका हे तर ईमानवाल्यांसाठी हिदायत आणि परिहार आहे. आणि जे ईमान आणत नाहीत त्यांच्या कानांत तर बहिरेपणा आणि जडत्व आहे. हे त्यांच्यावर आंधळेपण आहे. हे ते लोक आहेत, जे कोण्या लांबवरच्या ठिकाणाहून बोलाविले जात आहे.'' (सू.हा मीम सजदः – ४४)

१२) हा सरळ मार्ग इस्लाम आहे. याचा संबंध अल्लाहने आपल्याकडे केला आहे. ज्यामुळे त्या मार्गाचे महान होणे आणि त्याच्या मोठे होण्याची शान स्पष्ट होते. आणि हाच एक मुक्ती मार्ग होण्याकडे इशारा पण मिळतो.

१३) म्हणजे कयामतच्या दिवशी तमाम मामल्यांचा फैसला अल्लाहच्याच हातांत असेल. याच्यांत कडक धमकी आहे. जो मोबदला आणि शिक्षेला पात्र असेल.

महावाक्ये ८९ | **(४३) सू. जुखरुफ** | रुकूअ ७

اٰيَاتُهَا ٨٩ | (٤٣) سُوْرَةُ الزُّخْرُفِ مَكِّيَّةٌ (٦٣) | رُكُوْعَاتُهَا ٧

**परम दयाळू आणि कृपाळू**
**अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

**हा मीम** ①

حٰمٓ ۚ ①

**शपथ आहे या स्पष्ट पुस्तकाची** ②

وَالْكِتٰبِ الْمُبِيْنِ ۙ ②

**आम्ही त्यास अरबी भाषेचे कुरआन अवतरीत केले आहे;[1] की, तुम्ही समजून घ्याल.** ③

اِنَّا جَعَلْنٰهُ قُرْءٰنًا عَرَبِيًّا لَّعَلَّكُمْ تَعْقِلُوْنَ ۚ ③

**खचित्च हे लौहे महफूज मध्ये आहे आणि आमच्या जवळ उच्च मर्तबा आणि शहाणपणाचे[2] आहे.** ④

وَاِنَّهٗ فِيْٓ اُمِّ الْكِتٰبِ لَدَيْنَا لَعَلِيٌّ حَكِيْمٌ ۗ ④

**काय आम्ही या उपदेशाला, या आधारावर तुमच्यापासून दूर करुन घ्यावे की, तुम्ही मर्यादेच्या बाहेर निघून जाणारे लोक[3] आहात ?** ⑤

اَفَنَضْرِبُ عَنْكُمُ الذِّكْرَ صَفْحًا اَنْ كُنْتُمْ قَوْمًا
مُّسْرِفِيْنَ ⑤

**आणि आम्ही पूर्वीच्या लोकांमध्ये सुद्धां बरेचसे पैगंबर पाठविले** ⑥

وَكَمْ اَرْسَلْنَا مِنْ نَّبِيٍّ فِي الْاَوَّلِيْنَ ⑥

**जो पैगंबर त्यांच्याजवळ आला, त्यांनी त्याला थट्टा मस्करीतच उडविले** ⑦

وَمَا يَاْتِيْهِمْ مِّنْ نَّبِيٍّ اِلَّا كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ⑦

**तर आम्ही, यांच्यापेक्षां बलवान लोकांचा[4] नाश करून टाकला. आणि पूर्वीच्या लोकांची हकीकत चुकली[5] आहे.** ⑧

فَاَهْلَكْنَآ اَشَدَّ مِنْهُمْ بَطْشًا وَّمَضٰى مَثَلُ الْاَوَّلِيْنَ ⑧

**जर आपण यांना विचाराल की, आकाश आणि पृथ्वीला कोणी निर्माण केले तर खचित्च हे उत्तर देतील की त्यांना सर्वसमर्थ आणि सर्वज्ञानी (अल्लाह) नेच निर्माण केले आहे.[6]** ⑨

وَلَئِنْ سَاَلْتَهُمْ مَّنْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ لَيَقُوْلُنَّ
خَلَقَهُنَّ الْعَزِيْزُ الْعَلِيْمُ ۙ ⑨

१) जी जगाची एक मधुर भाषा आहे. दुसरे, याचे प्रथम संबोधित पण अरब होते. त्यांच्याच भाषेत कुरआन अवतीर्ण केले. की ते जर समजू इच्छतील, तर त्यांनी सहरीत्या समजू शकावे.

२) याच्यांत कुरआनाच्या त्या महानतेचे आणि प्रतिष्ठेचे वर्णन आहे, जे उच्च देवदुतात त्याला प्राप्त आहे. कारण की पृथ्वीवाल्यांनी सुद्धां, त्याच्या प्रतिष्ठेला आणि महानतेला लक्षांत ठेवून, त्याला खरोखर महत्त्व द्यावे. आणि त्याच्या पासून हिदायतचा तो उद्देश्य प्राप्त करावा, ज्यासाठी त्याला जगांत उतारण्यांत आले आहे. उम्मुल किताबने अभिप्रेत लौहे महफूज आहे.

३) याचे वेगवेगळे अर्थ करण्यांत आले आहेत. उदाहरणार्थ (१) तुम्ही कारण की गुन्ह्यांमध्ये फारच लिप्त आणि त्यावर अडून आहांत, म्हणून काय तुम्ही अशी कल्पना करता की, आम्ही तुम्हास उपदेश करणे सोडून देऊ? (२) किंवा तुमच्या कुफ्र आणि उधळपट्टीवर आम्ही तुम्हास काही म्हणणार नाही आणि तुम्हाला क्षमा करून टाकू (३) किंवा आम्ही तुम्हास गारद करून टाकू; आणि कोण्या गोष्टीचा तुम्हास न हुकूम देऊ न मना करू. (४) कारण की तुम्ही कुरआनावर ईमान आणणार नाहीत, म्हणून आम्ही कुरआन अवतरीत करण्याचा क्रमच बंद करून टाकावा. पहिल्या भावार्थाला इमाम तबरीने, आणि शेवटच्या भावार्थाला इमाम इब्ने कसीरने जास्त पसंत केले आहे. आणि म्हटले आहे की, ही अल्लाहची कृपा आहे की त्याने भलाई आणि कुरआना कडे निमंत्रण देण्याची शृंखला तोडली नाही. जरी ते तोंड फिरविण्यांत आणि नाकारण्यांत मर्यादेचे उल्लंघन करीत होते. कारण की ज्याच्या दैवी हिदायत आहे, त्याने याच्या मार्फत हिदायतला अंगीकारून घ्यावे. आणि ज्यांच्यासाठी दुर्दैव लिहिले जाऊन चुकले आहे, त्यांच्यावर तर्क पूर्ण व्हावा.

४) म्हणजे मक्केवाल्यांपेक्षा जास्त ताकदवान होते. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''ते यांच्यापेक्षा संख्या आणि सामर्थ्यात किती तरी जास्त होते.'' (सू.मोमिन-८२)

५) म्हणजे कुरआन मजीदमध्ये या लोकांची चर्चा किंवा वैशिष्ट्ये अनेक वेळा येऊन चुकली आहे. याच्यांत मक्केवाल्यांसाठी धमकावणी आहे की मागील लोक पैगंबरांना खोटे म्हणण्यामुळे गारद झाले. जर हे पण पैगंबरांना खोटे म्हणण्यावर अडीग राहतील, तर त्यांच्यासारखे हे पण गारद करून दिले जातील.

६) परंतु यास मान्य केल्यावर सुद्धा, याच सृष्टीमधून पुष्कळांना या नादानांनी, अल्लाहचा सरकतदार ठरवून घेतले. याच्यांत त्यांच्या अपराधाचे निंदनीय आणि वाईट होण्याचे पण वर्णन आहे. आणि त्यांच्या मूर्खपणाचे आणि अज्ञानाचे जाहीर होणे सुद्धा.

الَّذِیْ جَعَلَ لَكُمُ الْاَرْضَ مَهْدًا وَّجَعَلَ لَكُمْ فِیْهَا سُبُلًا لَّعَلَّكُمْ تَهْتَدُوْنَ ۝١٠

**तोच आहे ज्याने तुमच्या करीतां पृथ्वीला बिछाईत [१] बनविली आणि तिच्यांत तुमच्यासाठी मार्ग करून दिले की तुम्ही मार्गास लागाल. [२] १०**

وَالَّذِیْ نَزَّلَ مِنَ السَّمَآءِ مَآءًۢ بِقَدَرٍ ۚ فَاَنْشَرْنَا بِهٖ بَلْدَةً مَّیْتًا ۚ كَذٰلِكَ تُخْرَجُوْنَ ۝١١

**त्यानेच आकाशांतून एका अंदाजाने [३] पाणी वर्षविले; त्यामुळे मृत शहरास जिवंत करून दिले. अशाच रीतीने तुम्ही काढले जाल [४] ११**

وَالَّذِیْ خَلَقَ الْاَزْوَاجَ كُلَّهَا وَجَعَلَ لَكُمْ مِّنَ الْفُلْكِ وَالْاَنْعَامِ مَا تَرْكَبُوْنَ ۝١٢

**ज्याने प्रत्येक वस्तुंच्या जोड्या [५] बनविल्या आहेत. आणि तुमच्यासाठी गलबते बनविली. आणि चतुष्पाद जनावरे (निर्माण केलीत) ज्यांवर तुम्ही स्वार होता. १२**

لِتَسْتَوٗا عَلٰى ظُهُوْرِهٖ ثُمَّ تَذْكُرُوْا نِعْمَةَ رَبِّكُمْ اِذَا اسْتَوَیْتُمْ عَلَیْهِ وَتَقُوْلُوْا سُبْحٰنَ الَّذِیْ سَخَّرَ لَنَا هٰذَا وَمَا كُنَّا لَهٗ مُقْرِنِیْنَ ۝١٣

**की तुम्ही त्यांच्या पाठीवर बरोबर जमून बसत जा. [६] मग आपल्या पालनकर्त्याच्या देणगीची आठवण करा. जेव्हा तुम्ही त्यावर व्यवस्थित बसून जाल. आणि म्हणा की पवित्र आहे तो (अल्लाह) की ज्याला त्याने आमच्या वशीत (वश) करून दिले. यावर सुद्धा की आम्हांस त्यांना काबूत करण्याची ताकत [७] नव्हती १३**

وَاِنَّاۤ اِلٰى رَبِّنَا لَمُنْقَلِبُوْنَ ۝١٤

**आणि नक्कीच आम्ही आमच्या पालनकर्त्याकडे परतून जाणार आहोत [८] १४**

وَجَعَلُوْا لَهٗ مِنْ عِبَادِهٖ جُزْءًا ؕ اِنَّ الْاِنْسَانَ لَكَفُوْرٌ مُّبِیْنٌ ۝١٥

**आणि त्यांनी अल्लाहच्या काही सेवकांतून त्याचा अंश ठरविला. [९] खचित्च मनुष्य बोलून चालून मोठाच कृतघ्न आहे. १५**

१) अशी बिछाईत, ज्याच्यांत मजबुती आणि स्थिरता आहे. तुम्ही त्याच्यावर चालतात, उभे रहातात आणि झोपतात. आणि जेथे इच्छिता तेथे फिरतात. त्याने इला पर्वतांमार्फत दृढता दिली, की हिने डोलू व हलू नये.

२) म्हणजे एका इलाख्यातून दुसऱ्या इलाख्यांत, आणि एका देशांतून दुसऱ्या देशांत, जाण्याकरीतां मार्ग बनवून दिले. कारण की, कारभारासाठी, व्यापारांसाठी आणि दुसऱ्या उद्देश्यांसाठी तुम्ही येऊ जाऊं शकावे.

३) ज्याने तुमच्या आवश्यकता पूर्ण होऊ शकाव्या. कारण की आवश्यकतेपेक्षां कमी पाऊस झाला असता तर तो तुमच्यासाठी फायदेकारक झाला नसता. आणि जास्त झाला असता तर तो प्रलय झाला असतां. ज्यांत तुमच्या बुडून जाण्याचा आणि गारद होऊन जाण्याचा धोका होता.

४) म्हणजे ज्याप्रमाणे पावसामुळे मृत जमीन टवटवीत होऊन जाते, अशाच प्रकारे कयामतच्या दिवशी, तुम्हाला सुद्धा जिवंत करून, कबरींमधून काढून घेण्यांत येईल.

५) म्हणजे प्रत्येक वस्तुंला जोडी जोडी बनविले, नर आणि मादी, वनस्पती, शेत्या, फळे, फुले, आणि जनावरे सर्वांत नर मादीचा क्रम आहे. काही म्हणतात याच्याने एक दुसऱ्याच्या विरुद्ध गोष्टी आहेत. जसे प्रकाश आणि अंध:कार, आजार आणि आरोग्य, न्याय आणि अन्याय, चांगले आणि वाईट ईमान आणि कुफ्र, मृदु आणि कठीण, वगैरे.

६) 'लितस्तवु' अर्थांत दृढ जमून बसा. किंवा चढून जा.

७) म्हणजे जर त्या जनावरांना आमच्या ताब्यांत आणि आमच्या वश मध्ये न करून देता, तर आम्ही त्यांना आपल्या काबूत ठेवून, त्यांना स्वारी किंवा ओझी वहाणे आणि दुसऱ्या उद्देश्यांकरीता उपयोगांत आणूंशकलो नसतो.

८) नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, जेव्हा स्वारीवर स्वार होत तर तीन वेळा अल्लाहु अकबर म्हणत. आणि सुबहानल्लाजी पासून लमूनकलिबून पर्यंत पठण करत. याशिवाय भलाई आणि क्षेमकुशलाची प्रार्थना करीत. जी दुआंच्या पुस्तकांत पाहून घेण्यांत यावी. (स.मुस्लिम)

९) 'इबाद्' ने अभिप्रेत देवदूत आणि जुज्अून ने अभिप्रेत मुली म्हणजे देवदूत, ज्यांना मुशरिक लोक अल्लाहच्या मुली ठरवून त्यांची उपासना करीत असत. अशा प्रकारे ते सृष्टीला अल्लाहचा सरकतदार आणि त्याचा अंश मानत असत. वास्तविक तो या सर्व गोष्टींकडून पवित्र आहे. काहींनी अंशाने नवस म्हणून काढली जाणारी ती जनावरे अभिप्रेत धरली आहेत, ज्यांचा एक वांटा मुशरिक लोक अल्लाहच्या नांवावर आणि एक वांटा मूर्तीच्या नांवावर काढत असत. ज्याचा उल्लेख सू.अन्आम आ.१३६ मध्ये आहे.

**काय अल्लाहतआलाने आपल्या सृष्टीतून मुली तर स्वत:साठी घेतल्या आणि तुम्हांस मुलांनी संपन्न केले.**[१] ⑯

أَمِ اتَّخَذَ مِمَّا يَخْلُقُ بَنٰتٍ وَّ اَصْفٰكُمْ بِالْبَنِيْنَ ﴿١٦﴾

**वास्तविक यांच्यातून कोणाला त्या वस्तुंची खुषखबर दिली जाईल जिचा आरोप तो (अल्लाह) रहमानकडे लावत आहे, तेव्हा त्याचे तोंड काळे पडून जाते आणि तो उदास होऊन जातो.** ⑰

وَ اِذَا بُشِّرَ اَحَدُهُمْ بِمَا ضَرَبَ لِلرَّحْمٰنِ مَثَلًا ظَلَّ وَجْهُهٗ مُسْوَدًّا وَّهُوَ كَظِيْمٌ ﴿١٧﴾

**काय (अल्लाहची संतती मुली आहेत) ज्यांचे शृंगारात पालन पोषण झाले आणि वादविवादांत (आपल्या गोष्टीला) स्पष्ट करू न शकावे?**[२] ⑱

اَوَمَنْ يُّنَشَّؤُا فِي الْحِلْيَةِ وَهُوَ فِي الْخِصَامِ غَيْرُ مُبِيْنٍ ﴿١٨﴾

**आणि त्यांनी रहमानच्या उपासना करणाऱ्या देवदूतांना स्त्रिया ठरवून टाकले. काय त्यांच्या निर्मितीच्या वेळेला हे उपस्थित होते ? यांची ही साक्ष लिहून घेतली जाईल; आणि त्यांना (या गोष्टीची) विचारपूस केली जाईल**[३] ⑲

وَجَعَلُوا الْمَلٰٓئِكَةَ الَّذِيْنَ هُمْ عِبٰدُ الرَّحْمٰنِ اِنَاثًا ؕ اَشَهِدُوْا خَلْقَهُمْ ؕ سَتُكْتَبُ شَهَادَتُهُمْ وَيُسْئَلُوْنَ ﴿١٩﴾

**आणि म्हणता, जर अल्लाह इच्छिता, तर आम्ही त्यांची उपासना न करतो. त्यांना याचे काही ज्ञान**[४] **नाही. हे तर फक्त उटपटांग (खोट्या गोष्टी) म्हणत आहेत** ⑳

وَقَالُوْا لَوْ شَآءَ الرَّحْمٰنُ مَا عَبَدْنٰهُمْ ؕ مَا لَهُمْ بِذٰلِكَ مِنْ عِلْمٍ ۗ اِنْ هُمْ اِلَّا يَخْرُصُوْنَ ﴿٢٠﴾

१) यांत त्यांचे अज्ञान आणि मूर्खपणा चे वर्णन आहे. जे त्यांनी अल्लाहकरीतां संतती सुद्धा ठरविली आहे. ज्याला हे स्वत: नापसंत करतात. वास्तविक जर अल्लाहची संतती असती, तर काय असे झाले असते तर काय खुद्द त्याच्या करीतां मुली असत्या, आणि तुम्हाला त्याने मुलगे बहाल केले असते?

२) 'युनश्शऊ' चा अर्थ आहे संवर्धन आणि पालन पोषण. (१) स्त्रियांच्या दोन वैशिष्ट्यांची चर्चा खास म्हणून येथे केली गेली आहे. त्यांचे संवर्धन आणि पालन पोषण, दागदागिने आणि शृंगारात होत असते. म्हणजे जशी समज त्यांना येताच त्यांचे लक्ष, सौंदर्य संवर्धक आणि रुपवर्धक गोष्टीकडे जाते. उद्देश्य या खुलाशाने हा आहे की, ज्यांची अवस्था अशी आहे की, ते तर आपल्या वैयक्तिक मामल्याला पण ठिक करण्याची क्षमता आणि योग्यता बाळगत नाही. (२) जर कोणाशी वादविवाद आणि तक्रार झाली तर ते आपली गोष्ट पण योग्य पद्धतीने (नैसर्गिक लाजाळूवृत्तीमुळे) स्पष्ट करूशकत नाहीत. तसेच विरोधी पक्षाच्या प्रमाणांची तोड सुद्धा करूशकत नाही. ह्या स्त्रिच्या त्या दोन नैसर्गिक दुर्बलता आहेत. ज्यांच्या आधारावर पुरुष वर्ग, स्त्रियांवर एकपट महत्त्व बाळगतात. हिशेबाच्या दृष्टीने पण, पुरूषांचे हे श्रेष्ठत्व स्पष्ट आहे. कारण की, संभाषणाच्या याच संदर्भात, पुरुष आणि स्त्रिच्या दर्म्यान जी नैसर्गिक तफावत आहे. याच्या आधारावर, मुलीच्या तुलनेत मुलाच्या जन्माला जास्त पसंत केले जात होते. आणि केले जात आहे.

३) म्हणजे बदला देण्यासाठी, कारण की देवदूत अल्लाहच्या मुली होण्याचे काही प्रमाण त्यांच्याजवळ नसेल.

४) म्हणजे आपल्याकडून अल्लाहच्या मर्जीचा सहारा, हे त्यांचे मोठे प्रमाण आहे. कारण की उघडपणे ही गोष्ट बरोबर आहे की, अल्लाहच्या मर्जीशिवाय कुठलेही काम होत नाही. न होऊ शकते. परंतु ते या गोष्टीकडून बेखबर आहेत की, त्याची मर्जी, त्याच्या प्रसन्नतेपासून वेगळी गोष्ट आहे. प्रत्येक काम त्याच्या मर्जीनेच होते; परंतु तो प्रसन्न त्याच कामांपासून होतो, ज्याचा त्याने हुकूम दिला आहे, न की प्रत्येक त्या कामापासून जे मनुष्य अल्लाहच्या मर्जीने करतो. मनुष्य चोरी, कुकृत्य, जुलूम आणि मोठमोठे गुन्हे करतो; जर अल्लाह इच्छील तर कोणालाही हे गुन्हे करण्याचे सामर्थ्यच देणार नाही. लगेच त्याचा हात पकडेल, त्याच्या पावलांना अडवून टाकेल, त्याची दृष्टी घालवून टाकेल. परंतु ही बळजबरीची स्वरुपे आहेत. जेव्हांकी त्याने मनुष्याला विचार करण्याचे आणि अखत्याराचे स्वातंत्र्य दिले आहे. की त्याची कसोटी घेतली जावी. म्हणून त्याने दोन्ही प्रकाराच्या कामांचा खुलासा करून दिला आहे. ज्याने तो प्रसन्न होतो त्यांना पण; आणि ज्यांच्याने तो नाराज होतो, त्यांना सुद्धां. मनुष्य दोन्ही प्रकारच्या कामांतून, जे काम पण करील, अल्लाह त्याचा हात धरणार नाही. परंतु जर ते काम अपराध आणि गुन्ह्यांचे असेल, तर खचित्च त्याच्याने तो नाराज होईल, की त्याने अल्लाहने दिलेल्या अखत्याराचा उपयोग चुकीचा केला. तथापि हा अधिकार अल्लाह या जगांत परत घेणार नाही. अलबत् त्याची शिक्षा कयामतच्या दिवशी देईल.

| | |
|---|---|
| أَمْ آتَيْنَاهُمْ كِتَابًا مِّن قَبْلِهِ فَهُم بِهِ مُسْتَمْسِكُونَ ﴿٢١﴾ | काय आम्ही त्यांना याच्यापूर्वी आणखी कोणी पुस्तक दिले आहे; ज्याला यांनी मजबुत धरून ठेवले आहे[१] (२१) |
| بَلْ قَالُوا إِنَّا وَجَدْنَا آبَاءَنَا عَلَىٰ أُمَّةٍ وَإِنَّا عَلَىٰ آثَارِهِم مُّهْتَدُونَ ﴿٢٢﴾ | (नाही! नाही!!) किंबहुना हे तर म्हणतात की, आम्ही आमच्या वाडवडीलांना एका धर्मावर पावलो. आणि त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून, सन्मार्ग प्राप्त केला आहे. (२२) |
| وَكَذَٰلِكَ مَا أَرْسَلْنَا مِن قَبْلِكَ فِي قَرْيَةٍ مِّن نَّذِيرٍ إِلَّا قَالَ مُتْرَفُوهَا إِنَّا وَجَدْنَا آبَاءَنَا عَلَىٰ أُمَّةٍ وَإِنَّا عَلَىٰ آثَارِهِم مُّقْتَدُونَ ﴿٢٣﴾ | अशाच प्रकारे आपल्या पूर्वीसुद्धा, आम्ही ज्या वस्तीत कोणी भिवविणारा पाठविला, तेथील सुखसंपन्न लोकांनी हेच उत्तर दिले की, आम्ही आमच्या वाडवडीलांना एका धर्मावर (आणि एका मार्गावर) पावलो आणि आम्ही तर त्यांच्या पदोपदी, त्यांचेच अनुकरण करणार आहोत (२३) |
| قَالَ أَوَلَوْ جِئْتُكُم بِأَهْدَىٰ مِمَّا وَجَدتُّمْ عَلَيْهِ آبَاءَكُمْ قَالُوا إِنَّا بِمَا أُرْسِلْتُم بِهِ كَافِرُونَ ﴿٢٤﴾ | (पैगंबराने) सांगितले सुद्धा की, जरी मी, त्याच्यापेक्षा फार जास्त (उद्देश्यापर्यंत पोहचविणारा) सरळ मार्ग घेऊन आलो आहे, ज्यावर तुम्ही आपल्या वाडवडीलांना पावला. तेव्हा त्यांनी उत्तर दिले की, आम्ही तर याला मानणारच नाही. ज्याला देऊन तुम्हास पाठविण्यांत आले आहे.[२] (२४) |
| فَانتَقَمْنَا مِنْهُمْ فَانظُرْ كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الْمُكَذِّبِينَ ﴿٢٥﴾ | ह तर मग आम्ही त्यांच्यावर सूड उगविला आणि पाहून घ्यावे की, खोटे ठरवणाऱ्यांचा कसा परिणाम झाला? (२५) |
| وَإِذْ قَالَ إِبْرَاهِيمُ لِأَبِيهِ وَقَوْمِهِ إِنَّنِي بَرَاءٌ مِّمَّا تَعْبُدُونَ ﴿٢٦﴾ | आणि जेव्हा इब्राहीमने आपल्या पित्याला आणि आपल्या लोकांना सांगितले की, मी त्या वस्तुंकडून अलिप्त आहे, ज्यांची तुम्ही उपासना करीत आहांत (२६) |
| إِلَّا الَّذِي فَطَرَنِي فَإِنَّهُ سَيَهْدِينِ ﴿٢٧﴾ | शिवाय त्या व्यक्तीत्वाच्या ज्याने मला निर्माण केले; आणि तोच मला हिदायतपण करेल.[३] (२७) |
| وَجَعَلَهَا كَلِمَةً بَاقِيَةً فِي عَقِبِهِ لَعَلَّهُمْ يَرْجِعُونَ ﴿٢٨﴾ | आणि (इब्राहीम) यालाच, आपल्या संततीमध्ये बाकी राहणारी गोष्ट[४] कायम करून गेले की लोकांनी (अल्लाहकडे) वळून रहावे.[५] (२८) |

१) म्हणजे कुरआनाच्यापूर्वी कोणी पुस्तक, ज्यांत यांना अल्लाहशिवाय इतरांच्या उपासनेचा अधिकार दिला गेला आहे, ज्याला त्यांनी मजबुतीने धरून ठेवले आहे? म्हणजे असे नाही. किंबहुना वाडवडीलांच्या अंध अनुकरणाशिवाय, त्यांच्या जवळ कोणी प्रमाण नाही.

२) म्हणजे आपल्या वाडवडीलांच्या अंध अनुकरणांत, इतके पक्के होते की, पैगंबरांचा खुलासा आणि प्रमाण पण, त्यांना यापासून फिरवू शकला नाही. हे महावाक्य अंधानुकरण्याच्या खंडनाला आणि त्याच्या वाईट असण्याला फार मोठे प्रमाण आहे. (तपशिलाकरीतां पहावे फत्हुल कदीर)

३) म्हणजे ज्याने मला निर्माण केले आहे, तो मला आपल्या धर्माची समजपण देईल. आणि त्याच्यावर दृढ जमवून पण ठेवील. मी फक्त त्याचीच उपासना करेन.

४) म्हणजे हा कल्मा ला इलाहा इल्लल्लाह ची ताकीद आपल्या संततीला करून गेले. जसे सांगितले, ''याचीच ताकीद इब्राहीम आणि याकूबने आपल्या संततीला केली.'' (सू.बकर:-१३२) काहींनी 'जअलहा' मध्ये फाईल अल्लाहला ठरविले आहे. म्हणजे अल्लाहने या कलम्याला इब्राहीम नंतर त्यांच्या संततीमध्ये कायम ठेवले, आणि ते फक्त एका अल्लाहची उपासना करीत राहिले.

५) म्हणजे इब्राहीमच्या संततीमध्ये, हे एकेश्वरवादी यासाठी निर्माण केले की त्याच्या एकेश्वरवादाच्या प्रवचनाने लोकांनी शिर्कपासून परावृत्त होत रहावे. 'लअल्लहुम्' मध्ये, जमीरचा मर्जा मक्कावाले आहेत. म्हणजे कदाचित् मक्केवाले या धर्माकडे परतून येतील, जो ह.इब्राहीम عليه السلام चा धर्म होता. जो निव्वळ एकेश्वरवादावर आधारित होता, न की, शिर्कवर.

بَلْ مَتَّعْتُ هٰٓؤُلَآءِ وَاٰبَآءَهُمْ حَتّٰى جَآءَهُمُ الْحَقُّ وَرَسُوْلٌ مُّبِيْنٌ ﴿۲۹﴾

किंबहुना मी त्या लोकांना, आणि त्यांच्या वाडवडीलांना साहित्य आणि सामुग्री [१] दिली. येथपावेतो की, त्यांच्याजवळ सत्य आणि स्पष्ट ऐकविणारा पैगंबर येऊन पोहचला [२] (२९)

وَلَمَّا جَآءَهُمُ الْحَقُّ قَالُوْا هٰذَا سِحْرٌ وَّاِنَّا بِهٖ كٰفِرُوْنَ ﴿۳۰﴾

आणि सत्याच्या पोहचतांच ते बोलून पडले की, ही तर जादूंआहे आणि आम्ही त्यांस नाकारणारे आहोत [३] (३०)

وَقَالُوْا لَوْلَا نُزِّلَ هٰذَا الْقُرْاٰنُ عَلٰى رَجُلٍ مِّنَ الْقَرْيَتَيْنِ عَظِيْمٍ ﴿۳۱﴾

आणि म्हणू लागले हे कुरआन या दोन्ही वस्तीमधून कोण्या मोठ्या माणसांवर कांअवतरीत करण्यांत आले नाही? [४] (३१)

اَهُمْ يَقْسِمُوْنَ رَحْمَتَ رَبِّكَ ؕ نَحْنُ قَسَمْنَا بَيْنَهُمْ مَّعِيْشَتَهُمْ فِى الْحَيٰوةِ الدُّنْيَا وَرَفَعْنَا بَعْضَهُمْ فَوْقَ بَعْضٍ دَرَجٰتٍ لِّيَتَّخِذَ بَعْضُهُمْ بَعْضًا سُخْرِيًّا ؕ وَرَحْمَتُ رَبِّكَ خَيْرٌ مِّمَّا يَجْمَعُوْنَ ﴿۳۲﴾

काय तुमच्या पालनकर्त्याच्या दयेची हे वाटणी करीत आहेत? [५] आम्हीच त्यांच्या ऐहिक जीवनाची अन्नसंपत्ती यांच्यात वाटून टाकली आहे. आणि एकाला दुसऱ्यापेक्षा उच्च केले आहे. कारण की एकाने दुसऱ्याला आज्ञांकीत करून ठेवावे; [६] ज्याला हे लोक गोळा करीत फिरतात, त्यापेक्षा तुमच्या पालनकर्त्याची दया फारच उत्तम आहे. [७] (३२)

१) येथून पुन्हा त्या देणग्यांचा उल्लेख होत आहे, ज्या अल्लाहने त्यांना बहाल केल्या होत्या. आणि देणग्यांनंतर शिक्षेत घाई केली नाही. किंबहुना त्यांना पूर्ण ढिल दिली. ज्याच्याने ते धोक्यांत पडले आणि मनोकामनांचे सेवक बनून गेलेत.

२) 'हक' ने कुरआन आणि 'रसूल' ह.मुहम्मद सल्लल्लाहु व अलैहि व सल्लम अभिप्रेत आहेत. 'मुबीन' पैगंबराचे वैशिष्ट्य आहे. उघड करून सांगणारा, किंवा ज्याची पैगंबरी स्पष्ट आणि जाहीर आहे. याच्यांत काही लपवालपव आणि रहस्य नाही.

३) कुरआनाला जादू ठरवून त्याला नाकारुन टाकले. आणि पुढील शब्दांत ह.नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला क्षुल्लक लेखले आणि त्यांच्यांत दोष काढलेत.

४) दोन्ही वस्त्यांनी अभिप्रेत, मक्का आणि ताईफ आहे. आणि मोठ्या माणसाने अभिप्रेत, बहुतेक भाष्यकारांजवळ मक्केचा वलीद बिन मुगीरा आणि ताईफचा उर्वा बिन मसऊद सकफी आहेत. काहींनी आणखी काही लोकांची नांवे सांगितली आहे. तथापि उद्देश्य त्यांचा यापासून अशा माणसाची निवड आहे, जो पूर्वीपासूनच मोठ्या पदाचा मानकरी, भरपूर संपत्ती असलेला, आणि आपल्या लोकांत मान्यवर असेल. म्हणजे जर कुरआन अवतरीत झाले असते, तर दोन्ही वस्तीतून कोण्या अशाच व्यक्तीत्वावर अवतरीत झाले असते, न की, मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर. ज्यांच्या जवळ ऐहिक संपत्तीपण नाही; आणि आपल्या लोकांत कोण्या मानमर्तब्याच्या पदावर पण आरुढ नाहीत.

५) दया देणगीच्या अर्थांत आहेत. येथे सर्वांत मोठी देणगी (रहमत) पैगंबरी अभिप्रेत आहे. प्रश्न विचारणे इनकार करण्यासाठी आहे. म्हणजे हे काम यांचे नाही की, आपल्या पालनकर्त्याच्या देणग्या, विशेषत: पैगंबरीची देणगी, यांनी आपल्या मर्जीने वाटावी; परंतु हे फक्त अल्लाहचे काम आहे. कारण की तोच प्रत्येक गोष्टीचे ज्ञान, आणि प्रत्येक मनुष्याच्या स्थितीशी पूर्ण वाकबगार आहे. तोच चांगले समजतो की मनुष्यांमधून, पैगंबरीचा मुकूट कोणाच्या डोक्यावर ठेवावयाचा आहे. आणि आपले वह्य आणि पैगंबरी कोणाला बहाल करावयाची आहेत.

६) म्हणजे धन आणि संपत्ती, मानमर्तबा आणि पदे, आणि बुद्धी व शहाणपणांत आम्ही हा फरक आणि तफावत यासाठी ठेवली आहे की, जास्त धनसंपत्तीवाला, कमी संपत्तीवाल्याशी, आणि उच्च पदावाला, लहान पदवाल्यांशी, आणि बुद्धी आणि शहाणपणामध्ये सुसंपन्नता बाळगणारा, आपल्यापेक्षांकमी बुद्धी समज बाळगणाऱ्याकडून काम घेऊं शकावे. अल्लाहतआलाच्या या परिपक्व बुद्धीमत्तेने ब्रम्हांडाची ही व्यवस्था फार चांगल्या प्रकारे चालली आहे. नाही तर जर सर्वच्या सर्व, धनसंपत्तीत, मानाच्या पदात, ज्ञान व समजुतीमध्ये बुद्धी आणि शहाणपणांत, आणि दुसऱ्या ऐहिक साधन सामुग्रीमध्ये समान असते तर, कोणी कोणाचे काम करण्यांस तयार झाला नसता. अशा प्रकारे कनिष्ठ आणि क्षुल्लक समजली जाणारी कामे पण कोणी केली नसती. या मानवाच्या गरजाच आहेत, ज्या अल्लाहतआलाने फरक आणि तफावत मध्ये ठेवून दिल्या आहेत. ज्यामुळे प्रत्येक मनुष्य दुसऱ्या मनुष्य किंवा मनुष्यांवर अवलंबून आहे. सर्व मानवांच्या गरजा आणि आवश्यकता, कोणी एक मनुष्य, जरी तो अब्जोपती का असेना ! दुसऱ्या मनुष्यांची मदत घेतल्याशिवाय, पूर्ण करूंशकत नाही.

७) या दयेने अभिप्रेत परलोकातील त्या देणग्या आहेत, ज्या अल्लाहने आपल्या पुण्यवान सेवकांसाठी तयार करून ठेवल्या आहेत.

وَلَوۡلَاۤ اَنۡ يَّكُوۡنَ النَّاسُ اُمَّةً وَّاحِدَةً لَّجَعَلۡنَا لِمَنۡ يَّكۡفُرُ بِالرَّحۡمٰنِ لِبُيُوۡتِهِمۡ سُقُفًا مِّنۡ فِضَّةٍ وَّمَعَارِجَ عَلَيۡهَا يَظۡهَرُوۡنَ ۟ۙ ٣٣

**आणि जर अशी गोष्ट नसती, की तमाम लोक एकच समूहाचे होऊन जातील.[१] तर परम दयाळूं(अल्लाह) ला नाकारणाऱ्यांच्या घराची छते, आम्ही चांदीची बनवून दिली असती, आणि जिन्यांना सुद्धा, ज्यावर हे चढले असते.** ३३

وَلِبُيُوۡتِهِمۡ اَبۡوَابًا وَّ سُرُرًا عَلَيۡهَا يَتَّكِـُٔوۡنَ ۟ۙ ٣٤

**आणि त्यांच्या घराचे दरवाजे आणि तक्त सुद्धा ज्यांच्यावर ते तक्के लाऊन लाऊन बसत असतात.** ३४

وَزُخۡرُفًا ؕ وَاِنۡ كُلُّ ذٰلِكَ لَمَّا مَتَاعُ الۡحَيٰوةِ الدُّنۡيَا ؕ وَالۡاٰخِرَةُ عِنۡدَ رَبِّكَ لِلۡمُتَّقِيۡنَ ۟ ٣٥

**आणि सोन्याचे सुद्धां.[२] आणि हे सर्व काही असाच ऐहिक फायदा आहे; आणि परलोक तर तुमच्या पालनकर्त्याजवळ, (फक्त अल्लाहला) भिऊन वागणारांसाठीच आहे.[३]** ३५

وَمَنۡ يَّعۡشُ عَنۡ ذِكۡرِ الرَّحۡمٰنِ نُقَيِّضۡ لَهٗ شَيۡطٰنًا فَهُوَ لَهٗ قَرِيۡنٌ ۟ ٣٦

**आणि जो मनुष्य अल्लाहच्या स्मरणाकडून गाफील होऊन जाईल,[४] आम्ही त्याच्यावर एक शैतान नेमून देतो. तोच त्याचा साथी रहातो[५]** ३६

وَاِنَّهُمۡ لَيَصُدُّوۡنَهُمۡ عَنِ السَّبِيۡلِ وَيَحۡسَبُوۡنَ اَنَّهُمۡ مُّهۡتَدُوۡنَ ۟ ٣٧

**आणि ते त्यांना सन्मार्गापासून अडवितात; आणि हे याच कल्पनेत राहतात की, ते सरळ मार्गावर आहेत[६]** ३७

حَتّٰۤى اِذَا جَآءَنَا قَالَ يٰلَيۡتَ بَيۡنِىۡ وَبَيۡنَكَ بُعۡدَ الۡمَشۡرِقَيۡنِ فَبِئۡسَ الۡقَرِيۡنُ ۟ ٣٨

**येथपर्यंत की, जेव्हाआमच्याजवळ येईल, तेव्हा म्हणेल की अरेरे! माझ्या आणि तुझ्या दर्म्यान जर पूर्व आणि पश्चिमेचे अंतर असते! तर (तू) फारच वाईट साथीदार आहेस[७]** ३८

१) म्हणजे ऐहिक धनसंपत्ती आणि साधन सामुग्रीत आवड ठेवल्यामुळे इहलोकाचेच इच्छुक होऊन जाल. आणि अल्लाहची प्रसन्नता आणि परलोकाची इच्छा, सर्व विसरुन जाल.

२) म्हणजे काही वस्तू चांदीच्या आणि काही सोन्याच्या कारण की विविधतेत सौंदर्य जास्त चांगले उमटून दिसते. अर्थ हा आहे की, दुनियाची धनसंपत्ती आमच्या नजरेत इतकी क्षुल्लक आहे की, जर चर्चित धोका नसतांतर अल्लाहला नाकारणाऱ्यांना खूप दौलत दिली गेली असती. परंतु याच्यांत हाच धोका होता की मग जगांतील सर्व लोकच इहलोकाचेच पुजारी न बनून जावेत. इहलोकाचे क्षुल्लकत्व या हदीसने पण स्पष्ट आहे, ज्यांत सांगितले गेले आहे. ''जर इहलोकाची अल्लाहजवळ इतकी किंमत जरी असती जेवढे एका डांसाच्या पंखाला असते, तर अल्लाहतआला ने कोण्या काफिराला या दुनियेतून एक घोट पाणी पण पिण्यास दिले नसते.'' (तिर्मिझी, इब्ने माजा, किताबुल जुहद)

३) हे शिर्क आणि गुन्ह्यांपासून वांचणे आणि अल्लाहचे आज्ञापालन करीत रहावे; त्यांच्यासाठी परलोक आणि स्वर्गाच्या ढेणग्या आहेत. ज्यांना ऱ्हास आणि नाश नाही.

४) अशा चा अर्थ आहे, ''डोळ्याचा रात आंधळेपणा'' किंवा त्याच्याने जे आंधळेपण येते. म्हणजे जो अल्लाहच्या स्मरणाकडून आंधळा होऊन जाईल.

५) तो शैतान अल्लाहच्या स्मरणाकडून गाफील राहणाऱ्याचा साथीदार बनून जातो. जो नेहमी त्याच्याबरोबर राहतो. आणि पुण्यकर्मापासून अडवितो. किंवा मनुष्य स्वत: याच शैतानाचा साथीदार बनून जातो. आणि याच्यापासून वेगळा होत नाही. किंबहुना सर्व मामल्यांत त्याचेच अनुकरण आणि त्याच्या सर्व वसवशामध्ये त्याचे आज्ञापालन करतो.

६) म्हणजे तो शैतान यांच्या आणि सत्याच्या मार्गादरम्यान आडवे होऊन जातात. आणि यापासून त्याला अडवितात. आणि त्याला बरोबर समजावीत राहतात. की तुम्ही सत्यावर आहात; येथपावेतो की ते खरोखर आपल्या बाबतीत हीच कल्पना करु लागतात की, ते सत्यावर आहेत. किंवा काफिर शैतानाच्या बाबतीत समजत असतात की, हे बरोबर आहेत. आणि त्यांचे आज्ञापालन करीत राहतात. (फत्हुल कदीर)

७) मशरिकैन ने अभिप्रेत पूर्व आणि पश्चिम आहेत. तू फारच वाईट साथी आहे. हे काफिर कयामतच्या दिवशी म्हणेल. परंतु त्या दिवशी मान्य करण्याचा काय फायदा?

وَلَنۡ يَّنۡفَعَكُمُ الۡيَوۡمَ اِذۡ ظَّلَمۡتُمۡ اَنَّكُمۡ فِى الۡعَذَابِ مُشۡتَرِكُوۡنَ ﴿٣٩﴾

आणि जेव्हांकी तुम्ही जुलमी ठरून चुकले, तर तुम्हांस आज तुम्हा सर्वांचे शिक्षेत शामील होणे, मुळीच काही नफा देणार नाही. ३९

اَفَاَنۡتَ تُسۡمِعُ الصُّمَّ اَوۡ تَهۡدِى الۡعُمۡىَ وَمَنۡ كَانَ فِىۡ ضَلٰلٍ مُّبِيۡنٍ ﴿٤٠﴾

तर काय तू बहिऱ्यास ऐकवूशकतोस किंवा आंधळ्याला मार्ग दाखवूंशकतोस आणि त्याला जो स्पष्ट बहकलेला असेल? (१) ४०

فَاِمَّا نَذۡهَبَنَّ بِكَ فَاِنَّا مِنۡهُمۡ مُّنۡتَقِمُوۡنَ ﴿٤١﴾

तर, जर आम्ही तुला येथून घेऊन पण जाऊ, (२) तरी सुद्धाआम्ही त्यांच्यापासून बदला घेणार आहोत. (३) ४१

اَوۡ نُرِيَنَّكَ الَّذِىۡ وَعَدۡنٰهُمۡ فَاِنَّا عَلَيۡهِمۡ مُّقۡتَدِرُوۡنَ ﴿٤٢﴾

किंवा जो काही यांच्याशी वायदा केलेला (४) आहे, तो तुला दाखवून देऊं. आम्ही याचे पण सामर्थ्य बाळगतो. (५) ४२

فَاسۡتَمۡسِكۡ بِالَّذِىۡۤ اُوۡحِىَ اِلَيۡكَ‌ۚ اِنَّكَ عَلٰى صِرَاطٍ مُّسۡتَقِيۡمٍ ﴿٤٣﴾

तर जे वह्य आपणाकडे केले गेले आहे त्याला मजबुतीने धरुन ठेवा. (६) विश्वास ठेवा की, आपण सरळ मार्गावर आहात (७) ४३

وَاِنَّهٗ لَذِكۡرٌ لَّكَ وَلِقَوۡمِكَ‌ۚ وَسَوۡفَ تُسۡـَٔلُوۡنَ ﴿٤٤﴾

आणि खचित्च हा आपल्यासाठी आणि आपल्या लोकांसाठी (८) उपदेश आहे. आणि लवकरच तुम्हांलोकांची (याविषयी) विचारपूस होणार आहे. ४४

وَسۡـَٔلۡ مَنۡ اَرۡسَلۡنَا مِنۡ قَبۡلِكَ مِنۡ رُّسُلِنَاۤ اَجَعَلۡنَا مِنۡ دُوۡنِ الرَّحۡمٰنِ اٰلِهَةً يُّعۡبَدُوۡنَ ﴿٤٥﴾

आणि आमच्या त्या पैगंबरांना विचारा ज्यांना आम्ही (९) आपल्यापूर्वी पाठविले होते. की काय आम्ही रहमान (अल्लाह) शिवाय आणखी उपास्य ठरवून दिले होते, ज्यांची उपासना केली जावी? (१०) ४५

وَلَقَدۡ اَرۡسَلۡنَا مُوۡسٰى بِاٰيٰتِنَاۤ اِلٰى فِرۡعَوۡنَ وَمَلَا۟ئِهٖ فَقَالَ اِنِّىۡ رَسُوۡلُ رَبِّ الۡعٰلَمِيۡنَ ﴿٤٦﴾

आम्ही मूसाला आमचे चमत्कार देऊन, फिरऔन आणि त्याच्या दरबार मंडळाकडे पाठविले तेव्हा (मूसाने जाऊन) म्हटले की मी सकल जगांच्या पालनकर्त्याचा पैगंबर आहे. (११) ४६

فَلَمَّا جَآءَهُمۡ بِاٰيٰتِنَاۤ اِذَا هُمۡ مِّنۡهَا يَضۡحَكُوۡنَ ﴿٤٧﴾

मग जेव्हा ते आमचे प्रमाण घेऊन त्यांच्याजवळ आले, तेव्हा ते (त्यांची) हंशी उडवू लागले. (१२) ४७

وَمَا نُرِيۡهِمۡ مِّنۡ اٰيَةٍ اِلَّا هِىَ اَكۡبَرُ مِنۡ اُخۡتِهَا‌ وَاَخَذۡنٰهُمۡ بِالۡعَذَابِ لَعَلَّهُمۡ يَرۡجِعُوۡنَ ﴿٤٨﴾

आणि आम्ही त्यांना जी निशाणी दाखवित होतो ती दुसऱ्या निशाणीपेक्षा वरचढ रहात असे. (१३) आणि आम्ही त्यांना शिक्षेत धरले की कदाचित् ते माघार घेतील (१४) ४८

وَقَالُوۡا يٰۤاَيُّهَ السّٰحِرُ ادۡعُ لَنَا رَبَّكَ بِمَا عَهِدَ عِنۡدَكَ‌ۚ اِنَّنَا لَمُهۡتَدُوۡنَ ﴿٤٩﴾

आणि ते म्हणाले हे जादूगीर! (१५) आमच्याकरीता आपल्या पालनकर्त्याजवळ याची (१६) प्रार्थना कर, ज्याचे त्याने तुला वचन देऊन ठेवले आहे. (१७) विश्वास ठेव की आम्ही सरळमार्गाला लागून जाऊ (१८) ४९

१) म्हणजे ज्याच्या करता कायमचे दुर्भाग्य लिहून दिले गेले आहे, तो उपदेश आणि बोधाच्या अनुषंगाने बहिरा आणि आंधळा आहे. तुझ्या आवाहन आणि प्रचाराने तो सरळ मार्गावर येऊं शकत नाही. हे प्रश्न विचारणे नकारात्मक आहे. ज्याप्रमाणे बहिरा ऐकण्यापासून, आंधळा पहाण्यापासून, वंचित आहे. अशाचप्रकारे स्पष्ट बहकण्यात ग्रस्त, सत्याकडे येण्यापासून वंचित आहेत. हे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला सांत्वना देणे आहे की, अशा लोकांच्या कुफ्रने आपणाला जास्त व्याकुळता जाणवू नये.

२) म्हणजे तुला मृत्यू येऊन जावा, याच्यापूर्वी की त्यांच्यावर शिक्षा यावी किंवा तुला मक्केतून काढून नेले जावे.

३) जगांतच जर आमच्या मर्जीचा तगादा झाला, नाही तर परलोकातील शिक्षेने तर ते कोठल्याही परिस्थितीत वाचू शकत नाही.

४) म्हणजे तुझ्या मृत्यूपूर्वीच, किंवा मक्केतच तुझ्या रहात असतांना, यांच्यावर शिक्षा पाठवून द्यावी.

५) म्हणजे आम्ही जेव्हा इच्छू, यांच्यावर शिक्षा अवतरीत करूशकतो. कारण की आम्ही यांच्यावर समर्थ आहोत. म्हणून आपल्या जीवनांतच बद्रच्या युद्धांत, काफिर बोध घेण्यासारखा पराभव आणि अपमानांत ग्रस्त झालेत.

६) म्हणजे कुरआन करीमला, मग कोणी का त्याला खोटे ठरवेना!
७) हे फस्तम् सिक्ची सबब आहे.
८) या वैशिष्ट्यांचा हा अर्थ नाही की, दुसऱ्यांसाठी उपदेश नाही. किंबहुना प्रथम संबोधित, कारण की कुरैश होते, म्हणून त्यांचा उल्लेख केला. नाही तर कुरआन तर सकल जगासाठी उपदेश आहे. ''व मा हुव इल्ला जिकरुल लिल् आलमीन'' (सू.कलम-५२) जसा आपणांस हुकूम दिला गेला की, ''आपल्या कुरैशी नातेवाईकांना भिववावे.'' (सू.शुअरा-२१४) याचा अर्थ हा नाही की, अल्लाहचा संदेश फक्त नातेवाईकांनाच पोहचविण्याचा आहे. किंबहुना अर्थ आहे प्रचाराची सुरवात आपल्याच घराण्यापासून करावी. काहींनी येथे 'जिकर' प्रतिष्ठेच्या अर्थांत घेतला आहे. म्हणजे हे कुरआन तुझ्याकरीता आणि तुझ्या लोकांकरीता प्रतिष्ठा आणि सन्मानाला कारणीभूत आहे. की हे यांच्या भाषेत अवतीर्ण झाले; याला ते सर्वांत जास्त समजणारे आहेत. आणि याच्या मार्फत सकल जगावर श्रेष्ठत्व पाऊं शकतात. म्हणून त्यांना पाहिजे की, याचा अंगीकार करावा. आणि त्याच्या तगादा केलेल्या गोष्टींवर सर्वांत जास्त अंमलबजावणी करावी.
९) पैगंबरांना हा प्रश्न एक तर इसरा, मेअराजच्यावेळी बैतुल मुकद्दस किंवा आकाशावर केला गेला. जेथे अंबिया अलैहिमुस्सलामशी, नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या भेटी झाल्यांत. किंवा 'अत्बाअ' चा शब्द महजुफ आहे. म्हणजे त्यांचे अनुयायी (ग्रंथधारी लोक, यहूदी आणि ख्रिस्ती) लोकांना विचारा कारण की ते यांच्या शिकवणीला जाणतात. आणि त्यांच्यावर अवतरीत झालेली पुस्तके, त्यांच्याजवळ उपस्थित आहेत.
१०) उत्तर खचित्च नकारार्थी आहे. अल्लाहने कोणाही पैगंबराला हा हुकूम दिला नाही. किंबहुना याच्या उलट प्रत्येक पैगंबराला एकेश्वरवादाचे आवाहन करण्याचाच हुकूम दिला गेला.
११) मक्केच्या कुरैशींनी म्हटले होते की, जर अल्लाहला पैगंबर बनवून पाठवावयाचेच होते तर मक्का आणि ताईफच्या कोण्या अशा माणसाला पाठवता, जो श्रीमंत आणि मनसबदार असता. जसे फिरऔनाने सुद्धा ह.मूसा عليه السلام च्या तुलनेत सांगितले होते की, ''मी मूसापेक्षांश्रेष्ठ आहे. आणि हा माझ्या पेक्षां कमी दर्जाचा आहे; हा तर स्पष्ट बोलूही शकत नाही.'' जसे की पुढे येत आहे. म्हणून कदाचित् याच समान परिस्थितीमुळे, येथे ह.मूसा عليه السلام आणि फिरऔनाची गोष्ट पुन्हा सांगण्यांत येत आहे. याशिवाय याच्यात, हजरत नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सांत्वनाचा पैलूंआहे की, ह.मूसा عليه السلام ला पण पुष्कळशा कसोट्यांतून पार पडावे लागले. त्यांनी सहनशिलतेने आणि धैर्याने काम केले. अशाच प्रकारे आपण सुद्धा मक्केच्या काफिरांच्या त्रास देण्यावर, आणि त्यांच्या घोषणा आणि त्यांच्या चालचलनाने दु:खी मन होऊ नका. सहनशिलता आणि धैर्याने काम करावे. ह. मूसा عليه السلام प्रमाणेच सरशेवटी विजय आणि सफलता आपलीच आहे. आणि हे मक्केवाले फिरऔनाप्रमाणेच पराभूत होतील.
१२) म्हणजे जेव्हा ह.मूसा عليه السلام ने फिरऔन आणि त्यांच्या दरबार मंडळीला एकेश्वरवादाचे आवाहन केले, तेव्हा त्यांनी त्यांच्या पैगंबर होण्याचे प्रमाण मागितले; ज्यावर त्यांनी ती प्रमाणे आणि चमत्कार सादर केले, जे अल्लाहने त्यांना प्रदान केले होते. ज्यांना पाहून त्यांनी थट्टा आणि मस्करी केली. आणि म्हटले की ही कोणती अशी गोष्ट आहे. हे जादुच्या मार्फत आम्ही पण सादर करूशकतो.
१३) या निशाण्यांनी त्या निशाण्या अभिप्रेत आहेत, ज्या तूफान, टोळधाड, उवा, बेडूक आणि रक्त वगैरेच्या स्वरुपांत एकानंतर एक त्यांना दाखविण्यांत आल्या. ज्यांची चर्चा सू.अअराफ आ. १३३-१३५ मध्ये येऊन चुकली आहे. मागून येणारी प्रत्येक निशाणी, पहिल्या निशाणीपेक्षां वरचढ असे. ज्याच्याने ह.मूसा عليه السلام ची सत्यता, स्पष्ट आणि स्पष्टतर होऊन जात असे.
१४) उद्देश्य या निशाण्यांनी किंवा शिक्षांनी हा होता की, कदाचित ते खोटे ठरविण्यापासून माघार घेतील.
१५) असे म्हणतात की त्या काळात जादू ही वाईट समजली जात नसे. आणि पंडित आणि विद्वान माणसाला जादूगीर या शब्दाने, आदर सन्मान म्हणून संबोधित केले जात असे. याशिवाय चमत्कार आणि निशाण्यांच्या बाबतीत सुद्धा, त्यांची कल्पना होती की ही ह.मूसा عليه السلام च्या जादूगिरी कलेची कमाल आहे. म्हणून त्यांनी मूसाला जादूगर म्हणून संबोधित केले.
१६) ''आपल्या पालनकर्त्याकडे'' चे शब्द आपल्या शिर्कच्या विचारांमुळे म्हटले, कारण की, मुशरिक लोकांत वेगवेगळे उपास्य असत. मूसा! आपल्या पालनकर्त्याकडून हे काम करवून घ्या!
१७) म्हणजे आमच्या ईमान आणल्यावर, शिक्षा टाळण्याचे अभिवचन.
१८) जर या शिक्षा टळून गेल्या तर आम्ही तुला अल्लाहचा खरा पैगंबर मानून घेऊ, आणि तुझ्याच पालनकर्त्याची उपासना करू परंतु प्रत्येक वेळी ते आपले हे वचन तोडून टाकत, जसे की पुढील महावाक्यांत आहे. आणि सू.आअराफमध्ये सुद्धा येऊन चुकले.

فَلَمَّا كَشَفْنَا عَنْهُمُ الْعَذَابَ إِذَا هُمْ يَنكُثُونَ ﴿٥٠﴾

**मग जेव्हाआम्ही त्यांच्यावरून शिक्षा हटवून दिली त्यांनी त्याच वेळेस आपले वचन तोडून टाकले. (५०)**

وَنَادَىٰ فِرْعَوْنُ فِي قَوْمِهِ قَالَ يَا قَوْمِ أَلَيْسَ لِي مُلْكُ مِصْرَ وَهَٰذِهِ الْأَنْهَارُ تَجْرِي مِن تَحْتِي ۖ أَفَلَا تُبْصِرُونَ ﴿٥١﴾

**आणि फिरऔनाने आपल्या लोकांत दवंडी पिटविली, आणि म्हटले, [१] अहो माझ्या लोकांनो ! काय इजिप्तचे राज्य माझे नाही ? आणि माझ्या महालाखाली हे पाट वाहत [२] आहेत, काय तुम्ही पाहत नाही ? (५१)**

أَمْ أَنَا خَيْرٌ مِّنْ هَٰذَا الَّذِي هُوَ مَهِينٌ وَلَا يَكَادُ يُبِينُ ﴿٥٢﴾

**किंबहुना मी उत्तम आहे, त्याच्यापेक्षा जो क्षुल्लक [३] आहे, आणि निट बोलूंही शकत नाही. [४] (५२)**

فَلَوْلَا أُلْقِيَ عَلَيْهِ أَسْوِرَةٌ مِّن ذَهَبٍ أَوْ جَاءَ مَعَهُ الْمَلَائِكَةُ مُقْتَرِنِينَ ﴿٥٣﴾

**तर त्याला सोन्याचे कडे का घातले गेले नाही. [५] किंवा त्याच्या बरोबर रांग लावून देवदूतच आले असते [६] (५३)**

فَاسْتَخَفَّ قَوْمَهُ فَأَطَاعُوهُ ۚ إِنَّهُمْ كَانُوا قَوْمًا فَاسِقِينَ ﴿٥٤﴾

**त्याने आपल्या लोकांची बुद्धी मारून टाकली. आणि त्यांनी त्याचे मानून घेतले. [७] खचित्‌च हे सर्व लोक आज्ञाभंजकच होते. (५४)**

فَلَمَّا آسَفُونَا انتَقَمْنَا مِنْهُمْ فَأَغْرَقْنَاهُمْ أَجْمَعِينَ ﴿٥٥﴾

**मग जेव्हा त्यांनी आम्हांस क्रोधायमान केले, तेव्हाआम्ही त्यांच्यावर सूड उगविला; आणि सर्वांना बुडवून टाकले. (५५)**

فَجَعَلْنَاهُمْ سَلَفًا وَمَثَلًا لِّلْآخِرِينَ ﴿٥٦﴾

**आणि आम्ही त्यांना झाले गेलेले करून टाकले. आणि त्यांच्या मागे येणाऱ्यांसाठी उदाहरण बनवून टाकले. [८] (५६)**

وَلَمَّا ضُرِبَ ابْنُ مَرْيَمَ مَثَلًا إِذَا قَوْمُكَ مِنْهُ يَصِدُّونَ ﴿٥٧﴾

**आणि जेव्हा मर्यमच्या पुत्राचा दृष्टांत सांगितला गेला, तेव्हा त्याच्याने तुझे लोक खिदखिदू लागले. (५७)**

१) जेव्हा ह.मूसा ﷺ नी अशा कित्येक निशाण्या सादर करून टाकल्या ज्या एकापेक्षाएक वरचढ होत्या तेव्हा फिरऔनाला धोका वाटू लागला की, कोठे माझे लोक मूसाकडे न वळून जावोत ! म्हणून त्याने आपल्या पराजयाच्या डागाला लपविण्याकरिता, आणि लोकांना सतत धोका आणि फसवणुकीत व्यस्त ठेवण्याकरीता ही नवीन चाल चालला की, आपले अखत्यार आणि शानशौकतच्या हवाल्याने ह.मूसा ﷺ चे क्षुल्लकपणा आणि कनिष्ठतेला ठळकपणे लोकांच्या नजरेत आणून दिले जावे की, लोकांनी माझे राज्य आणि दबदब्यालाच भित रहावे.

२) याच्याने अभिप्रेत नाईल नदी किंवा तिच्या काही शाखा आहेत, ज्या त्याच्या महालाखालून वाहत होत्या.

३) 'अम्' 'बल्' (किंबहुना) च्या अर्थांत आहे. काहींच्या जवळ प्रश्नार्थकच आहे.

४) हा ह.मूसा ﷺ च्याअडखळण्याकडे इशारा आहे, जसे की सू.ताहामध्ये येऊन चुकले.

५) या काळांत इजिप्त आणि इराणचे राजे आपली वेगळी शान आणि विशेष स्थितीला जाहीर करण्यासाठी सोन्याचे कंगण घालीत असत. अशाच प्रकारे कबिल्यांचे सरदारांना देखील, हातांत सोन्याचे कडे आणि गळ्यांत सोन्याचा गळेबंद आणि साखळ्या टाकून दिल्या जात असत. जी त्यांच्या सरदारीची खूण पण समजली जात असे. याच अनुषंगाने फिरऔनने ह.मूसा ﷺ च्या बाबतीत म्हटले, जर त्याची काही किंमत, आणि वेगळी शान असती, तर त्याच्या हातात सोन्याचे कडे असावयास पाहिजे होते.

६) जे या गोष्टीला मान्य करते की, हा अल्लाहचा पैगंबर आहे किंवा राजे महाराजांप्रमाणे त्याची शान ठळकपणे दिसून यावी म्हणून, त्याच्या बरोबर असते.

७) म्हणजे 'इस्तखफ्फ उकुलहुम्' (इब्ने कसीर) त्याने आपल्या लोकांच्या बुद्धीला हलकी समजली, किंवा हलकी करून दिली. आणि त्यांना आपल्या अज्ञानावर आणि बहकण्यावर कायम राहण्याची ताकीद केली. आणि लोक त्याच्यामागे लागून गेले.

८) असफुना, अर्थ, जो आपल्या अस्तित्वांत, दुसऱ्या पेक्षां, प्रथम असेल. म्हणजे त्यांना नंतर येणाऱ्याँसाठी बोध आणि उपदेश बनवून दिला. की त्यांनी अशाप्रकारे कुफ्र आणि जुलूम, आणि अहंकार आणि फिसाद करू नये. ज्याप्रमाणे फिरऔनाने केला. कारण की त्यांनी त्याच्या सारखा धडा घेण्यालायक परिणामापासून सुरक्षित रहावे.

وَقَالُوٓا ءَأٰلِهَتُنَا خَيْرٌ أَمْ هُوَ ۚ مَا ضَرَبُوهُ لَكَ إِلَّا جَدَلًا ۚ بَلْ هُمْ قَوْمٌ خَصِمُونَ ﴿٥٨﴾

**आणि ते म्हणाले आमचे उपास्य चांगले आहेत का तो? तुला यांचे हे सांगणे निव्वळ झगडण्याच्या उद्देश्याने आहे. किंबहुना हे लोक आहेतच भांडखोर[१] ५८**

إِنْ هُوَ إِلَّا عَبْدٌ أَنْعَمْنَا عَلَيْهِ وَجَعَلْنَٰهُ مَثَلًا لِّبَنِىٓ إِسْرَٰٓءِيلَ ﴿٥٩﴾

**ईसा सुद्धा एक सेवकच आहे, ज्यावर आम्ही उपकार केला. आणि त्याला बनी इस्राईल करिता (आपल्या परम सामर्थ्याचा) नमुना बनविला[२] ५९**

وَلَوْ نَشَآءُ لَجَعَلْنَا مِنكُم مَّلَٰٓئِكَةً فِى ٱلْأَرْضِ يَخْلُفُونَ ﴿٦٠﴾

**जर आम्ही इच्छितो तर तुमच्या ऐवजी देवदूत करून देतो जे, पृथ्वीत तुमच्या जागी येऊन वसते.[३] ६०**

وَإِنَّهُۥ لَعِلْمٌ لِّلسَّاعَةِ فَلَا تَمْتَرُنَّ بِهَا وَٱتَّبِعُونِ ۚ هَٰذَا صِرَٰطٌ مُّسْتَقِيمٌ ﴿٦١﴾

**आणि खचित्च ईसा कयामतचे एक चिन्ह आहे.[४] तर तुम्ही (कयामतच्या बाबतीत) शंका घेऊ नका. आणि माझे आज्ञापालन करा. हाच सरळ मार्ग आहे. ६१**

१) शिर्कचे खंडन आणि खोट्या उपास्यांचे निरर्थक होण्याचा खुलाशा करिता जेव्हा मक्केच्या मुशरिकांना सांगण्यात येई की, तुमच्याबरोबर तुमचे उपास्यपण नरकाग्नीत जातील. तर त्याच्याने अभिप्रेत त्या दगडाच्या मूर्त्या होत्या, ज्यांची ते उपासना करीत न की ते पुण्यवान लोक, जे आपल्या जीवनांत, लोकांना एकेश्वरवादाचे आवाहन करीत राहिले. परंतु त्यांच्या मृत्यूनंतर, त्यांच्या मानणाऱ्यांनी त्यांना पण उपास्य समजणे सुरुं करुन दिले. यांच्या बाबतीत तर कुरआन करीमनेच स्पष्ट करून दिले आहे की, हे नरकाग्नीपासून दूर राहतील. ''ज्यांच्या करिता पुण्य पहिलेच आमच्याकडून ठरून चुकले आहे. ते सर्व नरकाग्नीपासून दुरच ठेवले जातील.'' (सू.अंबिया-१०१) कारणात याच्यात यांचा काही कसूर नव्हता. म्हणून कुरआनाने यांच्यासाठी जो शब्द वापरला आहे, तो शब्द 'मा' आहे. जो बुद्धीहींनासाठी उपयोगात आणला जातो. ''तुम्ही आणि अल्लाहशिवाय, ज्यांची ज्यांची उपासना तुम्ही करीत असतात, सर्व नरकाग्नीचे इंधन होतील.'' (सू.अंबिया-९८) यापासून अंबिया अलैहिस सलाम आणि ते सदाचरणी लोक निघून गेलेत, ज्यांना लोकांनी आपल्याकडून उपास्य बनवून ठेवले असेल. म्हणजे हे तर शक्य आहे की, दुसऱ्या मुर्त्यांबरोबर त्यांच्या चेहरेपट्टी सारख्या बनविलेल्या मूर्त्या सुद्धा, अल्लाहतआला नरकाग्नीत टाकून देईल. परंतु या व्यक्ती तर नरकाग्नीपासून कुठल्याही परिस्थितीत दुरच राहतील. परंतु मुशरिक लोक, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या शुभ मुखाने हजरत मसीहचा भला उल्लेख, ऐकून ही निरर्थक हुज्जत आणि भांडण करीत की जेव्हा ह.ईसा عليه السلام गौरवांस पात्र आहेत, वास्तविक खिस्त्यांनी त्यांना उपास्य बनविले आहे, तर मग आमचे उपास्य कां वाईट? काय ते पण उत्तम नाही ? किंवा जर आमचे उपास्य नरकाग्नीत जातील; तर ह.ईसा عليه السلام आणि ह.उजैर عليه السلام पण, तर मग नरकाग्नीत जातील. अल्लाहने येथे फर्माविले यांचे आनंदाने ओरडणे, निरर्थक भांडण आहे. 'जदल' चा अर्थच हा होतो की, भांडणाऱ्याला हे ठाऊक असते की, त्याच्याजवळ प्रमाण काही नाही. परंतु निव्वळ आपल्या गोष्टीच्या तरफदारीत, वादविवाद आणि तक्रार करण्यास तो मागेपुढे पाहत नाही.

२) एक या अनुषंगाने की, बापाशिवाय त्यांचा जन्म झाला. दुसरे खुद्द त्यांना जे चमत्कार दिले गेले, मृतांना जिवंत करणे, वगैरे; या अनुषंगाने सुद्धा.

३) म्हणजे तुम्हाला संपवून, तुमच्या जागी, पृथ्वीत देवदूतांना वसविले असते; जे तुमच्याच सारखे एक दुसऱ्याचे वारस बनते. अर्थ हा आहे की देवदुतांचे आकाशावर राहणे असे प्रतिष्ठीत नाही की त्यांची उपासना केली जावी. ही तर आमची मर्जी आणि ठरविलेली गोष्ट आहे की, देवदुतांना आकाशावर आणि मनुष्याला पृथ्वीवर वसविले; आम्ही इच्छूतर देवदूतांना पृथ्वीवर सुद्धा वसवूशकतो.

४) 'इल्म' चिन्ह च्या अर्थांत आहे. बहुतेक भाष्यकारांजवळ, याचा अर्थ हा आहे की, कयामतच्या जवळ त्यांचे आकाशांतून अवतरण होईल. जसे की सहीह आणि क्रमवार हदीर्शीनी सिद्ध आहे. हे अवतरण या गोष्टीचे चिन्ह असेल, की आतां कयामत जवळ आहे. म्हणूनच काहींनी याला ऐन आणि लामच्या जबर बरोबर वांचले आहे. ज्याचा अर्थच निशाणी आणि चिन्हाचा आहे. आणि काहींच्या जवळ त्यांना कयामतची निशाणी ठरविणे, त्यांच्या चमत्कारीक जन्माच्या आधारावर आहे. म्हणजे ज्याप्रमाणे अल्लाहने त्यांना बापाशिवाय जन्माला आणले, या गोष्टीचे चिन्ह आहे की, अल्लाहतआला कयामतच्या दिवशी तमाम माणसांना दुसऱ्यांदा जिवंत करील. म्हणून अल्लाहच्या सामर्थ्याला पाहून कयामतच्या घडून येण्यांत काही शंकेला जागा राहत नाही. 'इन्नहु' मध्ये जमीरचा मर्जा, ह.ईसा عليه السلام आहेत.

وَلَا يَصُدَّنَّكُمُ الشَّيْطٰنُ ۚ اِنَّهٗ لَكُمْ عَدُوٌّ مُّبِيْنٌ ﴿٦٢﴾

आणि शैतानाने तुम्हास अडथळा करू नये. खचितच तो तुमचा उघड शत्रू आहे. ६२

وَلَمَّا جَآءَ عِيْسٰى بِالْبَيِّنٰتِ قَالَ قَدْ جِئْتُكُمْ بِالْحِكْمَةِ وَلِاُبَيِّنَ لَكُمْ بَعْضَ الَّذِيْ تَخْتَلِفُوْنَ فِيْهِ ۚ فَاتَّقُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوْنِ ﴿٦٣﴾

आणि जेव्हां ईसाने चमत्कार आणलेत, तेव्हा म्हणाला की, मी तुम्हांपाशी शहाणपणाच्या गोष्टी घेऊन आलो आहे. आणि यासाठी आलो आहे की, ज्या काही गोष्टीत तुम्ही मतभेद करीत आहात, त्यांना (मी) स्पष्ट करून द्यावे. [१] तर तुम्ही अल्लाहतआलाला भ्या आणि माझा कह्या माना ६३

اِنَّ اللّٰهَ هُوَ رَبِّيْ وَرَبُّكُمْ فَاعْبُدُوْهُ ۭ هٰذَا صِرَاطٌ مُّسْتَقِيْمٌ ﴿٦٤﴾

माझा आणि तुमचा पालनकर्ता फक्त अल्लाहतआलाच आहे. तर तुम्ही सर्व त्याची उपासना करा. सरळ मार्ग हाच आहे. ६४

فَاخْتَلَفَ الْاَحْزَابُ مِنْۢ بَيْنِهِمْ ۚ فَوَيْلٌ لِّلَّذِيْنَ ظَلَمُوْا مِنْ عَذَابِ يَوْمٍ اَلِيْمٍ ﴿٦٥﴾

मग (बनी इस्राईलच्या गटांनी) आपसांत मतभेद केला. [२] तर जुलमी लोकांसाठी वाईट आहे. दु:खदायक दिवसाच्या शिक्षेने ६५

هَلْ يَنْظُرُوْنَ اِلَّا السَّاعَةَ اَنْ تَاْتِيَهُمْ بَغْتَةً وَّهُمْ لَا يَشْعُرُوْنَ ﴿٦٦﴾

हे लोक फक्त कयामतची वाट पहात आहेत की ती अचानक यांच्यावर येऊन पडेल, आणि यांना कळणार सुद्धा नाही. ६६

اَلْاَخِلَّآءُ يَوْمَئِذٍۭ بَعْضُهُمْ لِبَعْضٍ عَدُوٌّ اِلَّا الْمُتَّقِيْنَ ﴿٦٧﴾

त्या दिवशी घनिष्ठ मित्र सुद्धा एक दुसऱ्याचे शत्रू होऊन जातील; अल्लाहला भिणाऱ्यांशिवाय [३] ६७

يٰعِبَادِ لَا خَوْفٌ عَلَيْكُمُ الْيَوْمَ وَلَآ اَنْتُمْ تَحْزَنُوْنَ ﴿٦٨﴾

हे माझ्या सेवकांनो! आज तर तुम्हास कुठलेही भय नाही आणि तुम्ही; दु:खी पण होणार नाही. [४] ६८

اَلَّذِيْنَ اٰمَنُوْا بِاٰيٰتِنَا وَكَانُوْا مُسْلِمِيْنَ ﴿٦٩﴾

ज्यांनी आमच्या निशाण्यांवर ईमान आणले, आणि ते होते सुद्धा(आज्ञाधारक) मुसलमान ६९

اُدْخُلُوا الْجَنَّةَ اَنْتُمْ وَاَزْوَاجُكُمْ تُحْبَرُوْنَ ﴿٧٠﴾

तुम्ही आणि तुमच्या पत्न्या आनंदाने स्वर्गांत दाखल होऊन जा. [५] ७०

१) याच्या करीता पहावे, सू.आले इमरान आ.५५ चा समास.

२) याच्याने अभिप्रेत यहूदी आणि ख्रिस्ती आहेत. यहूद्यांनी ह.ईसा عليه السلام वर आरोप लावला आणि त्यांना नाऊजो बिल्लाह व्याभिचाराने जन्मास आल्याचे ठरविले. जेव्हाकी ख्रिस्त्यांनी मर्यादेच्या पुढे जाऊन त्यांना उपास्य बनवून घेतले. किंवा अभिप्रेत ख्रिस्त्यांचेच वेगवेगळे पंथ आहेत. जे ह.ईसा عليه السلام च्या बाबतीत एक दुसऱ्याशी तिव्र मतभेद ठेवतात. एक त्यांना अल्लाहचा पुत्र, दुसरा अल्लाह आणि तिसऱ्या मधला एक म्हणतो. आणि एक पंथ, मुसलमानांप्रमाणेच त्यांना अल्लाहचा सेवक आणि त्याचा पैगंबर मानतो.

३) कारण की काफिरांची मैत्री कुफ्र आणि आज्ञाभंजनाच्या आधारावरच होत असते. आणि हेच कुफ्र आणि आज्ञाभंजन त्यांच्या शिक्षेला कारणीभूत होतील. ज्यामुळे ते एक दुसऱ्यावर आरोप प्रत्यारोप करतील. आणि एक दुसऱ्याचे शत्रू होऊन जातील. याच्या उलट ईमान आणि ईशभयवाले, यांचे आपसातील प्रेम कारण की, धर्म आणि अल्लाहच्या प्रसन्नतेच्या आधारावर असते. आणि हेच धर्म आणि ईमान भलाई आणि पुण्यप्रतिफळाला कारणीभूत असते. याच्याने त्यांच्या मैत्रीत काही खंड पडणार नाही. ती अशाच प्रकारे कायम राहील, ज्याप्रमाणे इहलोकांत होती.

४) हे कयामतच्या दिवशी अल्लाहला भिणाऱ्यांना सांगण्यात येईल, जे इहलोकांत फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी, एक दुसऱ्यावर प्रेम करीत होते. जसे की हदीर्शीमध्ये सुद्धां याचे महात्म्य आलेले आहे. किंबहुना अल्लाहकरीतां द्धेष आणि अल्लाहकरीता प्रेमाला ईमानाच्या कमालीचा पाया सांगण्यात आला आहे.

५) 'अजवाजुकुम' ने काहींनी ईमानवाल्या पत्न्या, काहींनी ईमानवाले साथी, आणि काहींनी स्वर्गांत मिळणाऱ्या मोठ्या डोळ्यांच्या अप्सरा पत्न्या, अभिप्रेत धरल्या आहेत. हे सर्वच भावार्थ बरोबर आहेत. कारण की स्वर्गांत हे सर्व काहीच होईल.

يُطَافُ عَلَيۡهِمۡ بِصِحَافٍ مِّنۡ ذَهَبٍ وَّاَكۡوَابٍ ۚ وَفِيۡهَا مَا تَشۡتَهِيۡهِ الۡاَنۡفُسُ وَتَلَذُّ الۡاَعۡيُنُ ۚ وَاَنۡتُمۡ فِيۡهَا خٰلِدُوۡنَ ۚ﴿۷۱﴾

**यांच्या चोहो बाजूने, सोन्याच्या ताटल्या आणि सोन्याचे पेले फिरविले जातील; [१] यांचे जीव ज्या वस्तुची इच्छा करतील; आणि ज्याच्याने त्यांना नेत्रसुख प्राप्त होईल, सर्व तेथे असेल. आणि तुम्ही येथे नेहमी राहाल [२] ७१**

وَتِلۡكَ الۡجَنَّةُ الَّتِيۡۤ اُوۡرِثۡتُمُوۡهَا بِمَا كُنۡتُمۡ تَعۡمَلُوۡنَ ﴿۷۲﴾

**हाच तो स्वर्ग आहे की, तुम्ही आपल्या कर्मांच्या बदल्यांत याचे वारस बनविले गेले आहांत ७२**

لَكُمۡ فِيۡهَا فَاكِهَةٌ كَثِيۡرَةٌ مِّنۡهَا تَاۡكُلُوۡنَ ﴿۷۳﴾

**येथे तुमच्याकरीता भरपूर फळफळादी आहेत, ज्यांना तुम्ही खात राहाल ७३**

اِنَّ الۡمُجۡرِمِيۡنَ فِيۡ عَذَابِ جَهَنَّمَ خٰلِدُوۡنَ ۚ﴿۷۴﴾

**नि:संशय गुन्हेगार लोक नरकाग्नीच्या शिक्षेत नेहमी राहतील ७४**

لَا يُفَتَّرُ عَنۡهُمۡ وَهُمۡ فِيۡهِ مُبۡلِسُوۡنَ ۚ﴿۷۵﴾

**ही शिक्षा कधीही यांच्यावरून हलकी केली जाणार नाही. आणि ते इच्यांतच निराश होऊन पडून राहतील. [३] ७५**

وَمَا ظَلَمۡنٰهُمۡ وَلٰكِنۡ كَانُوۡا هُمُ الظّٰلِمِيۡنَ ﴿۷۶﴾

**आणि आम्ही त्यांच्यावर जुलूम केला नाही, किंबहुना हे स्वत:च जालीम होते ७६**

وَنَادَوۡا يٰمٰلِكُ لِيَقۡضِ عَلَيۡنَا رَبُّكَ ؕ قَالَ اِنَّكُمۡ مّٰكِثُوۡنَ ﴿۷۷﴾

**आणि हांक मारून मारून म्हणतील की, हे मालिक! [४] तुझ्या पालनकर्त्याने आमचा अंत करून टाकावा! [५] तो म्हणेल की तुम्हांस तर (नेहमी) रहावयाचे आहे. [६] ७७**

لَقَدۡ جِئۡنٰكُمۡ بِالۡحَقِّ وَلٰكِنَّ اَكۡثَرَكُمۡ لِلۡحَقِّ كٰرِهُوۡنَ ﴿۷۸﴾

**आम्ही तर तुमच्याजवळ सत्य घेऊन आलो; परंतु तुमच्यातून बहुतेक लोक [७] सत्याचा तिरस्कार करणारे होते. ७८**

اَمۡ اَبۡرَمُوۡۤا اَمۡرًا فَاِنَّا مُبۡرِمُوۡنَ ۚ﴿۷۹﴾

**काय त्यांनी कोण्या कामाचा पक्का इरादा करून घेतला आहे, तर विश्वास ठेवा, आम्ही पण पक्के काम करणारे आहोत [८] ७९**

१)'सिहाफ' 'सहफतून' चे अनेकवचन आहे, म्हणजे ताटली. सगळ्यात मोठ्या भांड्याला 'जफनतुन' म्हटले जाते, याच्यापेक्षां लहान 'कसअतुन' (ज्यांच्यात दहा माणसे पोट भरून खातात) मग 'सहफतून' (कसअताच्या अर्धे) मग 'मिकयलतून' आहे. अर्थ आहे की स्वर्गवाल्यांना जी जेवणे मिळतील, ती सोन्याच्या ताटांत असतील. (फत्हुल कदीर)

२) म्हणजे ज्या प्रमाणे एक वारस, मिराशीचा मालक होतो. अशा प्रकारे स्वर्ग सुद्धा एक मिरास आहे. जिचे वारस ते होतील, ज्यांनी जगांत ईमान आणि सुकृत्येवाले जीवन घालवले असेल.

३) म्हणजे मुक्तीपासून निराश.

४) मालिक, नरकाग्नीच्या पहारेकऱ्याचे नाव आहे.

५) म्हणजे आम्हांला मृत्युच देऊन टाकावा की, शिक्षेपासून जीव मुक्त व्हावा.

६) म्हणजे तेथे मृत्यु कोठे ? परंतु हे शिक्षेचे जीवन मृत्युपेक्षाही वाईट असेल. तथापि, याच्या शिवाय उपाय सुद्धा नसेल.

७) हे अल्लाहतआलाचे म्हणणे आहे किंवा देवदूतांचेच म्हणणे, अल्लाहचे प्रतिनिधी म्हणून आहे. जसा कोणी अधिकारी 'आम्ही' चा उपयोग सत्तेच्या भावार्थात करतो. बहुतेकांनी अभिप्रेत सर्व आहेत. म्हणजे सर्वच नर्कवासीय, किंवा मग बहुतेक, अभिप्रेत श्रीमंत आणि पुढारी आहेत. बाकी नर्कवासीय त्यांचे अनुयायी असल्या कारणाने, याच्यांत शामील होतील. सत्याने अभिप्रेत अल्लाहचा तो धर्म आणि संदेश आहे, जो तो पैगंबरामार्फत पाठवित राहिला. शेवटचे सत्त्य कुरआन आणि इस्लामधर्म आहे.

८) 'इबराम' चा अर्थ आहे पक्के आणि मजबुत करणे. 'बल्' च्या अर्थांत म्हणजे या नर्कवासियांनी, सत्त्याला नापसंतच केले नाही. किंबहुना हे त्याच्या विरुद्ध सुनियोजित युक्त्या आणि कारस्थाने करीत राहिले. ज्यांच्या मुकाबल्यात मग आम्ही सुद्धा आमची युक्ती केली. आणि आमच्यापेक्षांजास्त मजबुत युक्ती कोणाची होऊ शकते? याच्याच समान अर्थी हे महावाक्य आहे. ''काय हे लोक कोणी चाल चालू इच्छिता? (तर विश्वास ठेवा) हे काफिर स्वत:च धोक्यांत आहे.'' (सू.तूर-४२)

أَمْ يَحْسَبُونَ أَنَّا لَا نَسْمَعُ سِرَّهُمْ وَنَجْوَاهُمْ ۚ بَلَىٰ وَرُسُلُنَا لَدَيْهِمْ يَكْتُبُونَ ﴿٨٠﴾

**काय यांची ही कल्पना आहे की, आम्ही त्यांच्या गुप्त गोष्टींना, आणि खलबतांना ऐकत नाही? (खचित्‌च आम्ही ते बरोबर ऐकत आहोत) [१] किंबहुना आमचे पाठविलेले (देवदूत) त्यांच्याजवळच लिहीत आहेत [२] ⑧०**

قُلْ إِن كَانَ لِلرَّحْمَٰنِ وَلَدٌ فَأَنَا أَوَّلُ الْعَابِدِينَ ﴿٨١﴾

**आपण सांगून द्या की, जर परम दयाळू (अल्लाह) ची जर कोणी संतती असती तर मी सर्वांत प्रथम (त्याची) उपासना करतो. [३] ⑧१**

سُبْحَانَ رَبِّ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ رَبِّ الْعَرْشِ عَمَّا يَصِفُونَ ﴿٨٢﴾

**आकाश व पृथ्वी आणि महासिंहासनाचा पालनकर्ता, जे काही हे सांगत आहे, त्यापासून परम पवित्र आहे. [४] ⑧२**

فَذَرْهُمْ يَخُوضُوا وَيَلْعَبُوا حَتَّىٰ يُلَاقُوا يَوْمَهُمُ الَّذِي يُوعَدُونَ ﴿٨٣﴾

**आतांआपण त्यांना या वादविवादात आणि खेळण्या कुदण्यांत सोडून द्या. [५] येथ पावेतो की, त्यांना त्या दिवसाला सामोरे जावे लागेल, ज्याचे यांना वचन दिले जात आहे. [६] ⑧३**

وَهُوَ الَّذِي فِي السَّمَاءِ إِلَٰهٌ وَفِي الْأَرْضِ إِلَٰهٌ ۚ وَهُوَ الْحَكِيمُ الْعَلِيمُ ﴿٨٤﴾

**तोच आकाशांत सुद्धा उपास्य आहे आणि पृथ्वीत सुद्धा. तोच उपासनेला योग्य आहे. आणि [७] तो बुद्धीमान आणि पूर्ण ज्ञाता आहे. ⑧४**

وَتَبَارَكَ الَّذِي لَهُ مُلْكُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا وَعِندَهُ عِلْمُ السَّاعَةِ وَإِلَيْهِ تُرْجَعُونَ ﴿٨٥﴾

**आणि तो खूप बरकतवाला आहे ज्याच्याजवळ आकाश आणि पृथ्वी आणि यांच्या दर्म्यानचे राज्य [८] आहे. आणि कयामतचे ज्ञानपण त्याच्याच जवळ [९] आहे. आणि त्याच्याच कडे तुम्हासर्वांस परतून [१०] जाणे आहे. ⑧५**

१) म्हणजे गुप्त गोष्टी ते आपल्या मनांत लपवून फिरतात. किंवा एकातात हळूहळू करतात. किंवा आपसांत खलबते करतात. काय त्यांना असे वाटते की ते आम्ही ऐकत नाही? अर्थ आहे आम्ही सर्व ऐकतो आणि जाणतो.

२) म्हणजे आम्ही खचित्‌च ऐकतो. याशिवाय आमचे पाठविलेले देवदूत त्यांच्या सर्व गोष्टींची नोंद करतात ती वेगळीच!

३) कारण की मी अल्लाहच्या आधिन आणि त्याचा आज्ञाधारक आहे. जर खरोखर त्याची संतती असती, तर सर्वांत पहिले मी तिची उपासना करणारा झालो असतो. अर्थ, मुशरिक लोकांचे धारणेचे निरर्थक होणे, आणि खंडन करणे आहे; जे अल्लाहची संतती सिद्ध करतात.

४) हे अल्लाहचे बोल आहेत, ज्यात त्याने आपल्या वाईट गोष्टींपासून पवित्र असणे, आणि त्याचे पावित्र्य वर्णन केले आहे. किंवा पैगंबर ﷺ चे बोल आहेत आणि आपण ﷺ नी सुद्धा अल्लाहच्या हुकूमाने या वाईट गोष्टीपासून अल्लाहचे पवित्र असणे वर्णन केले, ज्याचा संबंध, मुशरिक लोक अल्लाहकडे सोडत होते.

५) म्हणजे जर हे हिदायतचा मार्ग, अंगिकारत नाही, तर आता त्यांना त्यांच्या स्थितीवर सोडून द्यावे. आणि इहलोकाच्या खेळ कुदमध्ये लागून राहू द्यावे. हे भिवविणे आणि तंबी आहे.

६) त्यांचे डोळे त्या दिवशी उघडतील, जेव्हा त्यांना त्यांच्या या चालचुणूकचा परिणाम त्यांच्या समोर येईल.

७) असे नाही की, आकाशाचा उपास्य आणखी कोणी असावा आणि पृथ्वीचा आणखी कोणी. किंबहुना या उभयतांचा निर्माणकर्ता एक आहे, उपास्यपण एकच आहे. याच्या समान अर्थी हे महावाक्य आहे. ''आकाश आणि पृथ्वीत तोच अल्लाह आहे, जो तुमच्या गुप्त आणि उघड गोष्टींना जाणतो. आणि जे काही तुम्ही करीत आहांत. ते पण त्याच्या ज्ञानांत आहे.'' (सू.अन्आम-३)

८) अशा व्यक्तीत्वाला, जिच्याजवळ सर्व अधिकार आणि आकाश आणि पृथ्वीचे राज्य असावे, तिला बरे संततीची काय आवश्यकता.

९) जिला तो आपल्या वेळेवर जाहीर करेल.

१०) जेथे तो प्रत्येकाला त्याच्या कर्मांप्रमाणे बक्षीस किंवा शिक्षा देईन.

وَلَا يَمْلِكُ الَّذِينَ يَدْعُونَ مِن دُونِهِ الشَّفَاعَةَ إِلَّا مَن شَهِدَ بِالْحَقِّ وَهُمْ يَعْلَمُونَ ﴿٨٦﴾

ज्यांना हे लोक अल्लाहशिवाय बोलावितात, ते शिफारस करण्याचा अधिकार बाळगत नाहीत;[१] (हां! शिफारस करण्याला पात्र ते आहेत) जे सत्य गोष्टीला मान्य करतील, आणि त्यांना ज्ञान पण असेल.[२] ८६

وَلَئِن سَأَلْتَهُم مَّنْ خَلَقَهُمْ لَيَقُولُنَّ اللَّهُ ۖ فَأَنَّىٰ يُؤْفَكُونَ ﴿٨٧﴾

जर आपण त्यांना विचाराल की, त्यांना कोणी निर्माण केले आहे ? तर खचित्च हे उत्तर देतील की, अल्लाहने. तर मग हे कोठे उलटे चालले जात आहेत ? ८७

وَقِيلِهِ يَا رَبِّ إِنَّ هَٰؤُلَاءِ قَوْمٌ لَّا يُؤْمِنُونَ ﴿٨٨﴾

आणि त्यांचे (पैगंबराचे बहुतेक) हे म्हणणे की हे माझ्या पालनकर्त्या![३] खचितच हे ते लोक आहेत, जे ईमान आणित नाहीत ८८

فَاصْفَحْ عَنْهُمْ وَقُلْ سَلَامٌ ۚ فَسَوْفَ يَعْلَمُونَ ﴿٨٩﴾

तर आपण त्यांच्याकडून तोंड फिरवून घ्या. आणि त्यांना निरोपाचा सलाम सांगून द्या.[४] त्यांना लवकरच (स्वत:च) ठाऊक होऊन जाईल. ८९







حم ﴿١﴾

हा मीम १

وَالْكِتَابِ الْمُبِينِ ﴿٢﴾

शपथ आहे या सुव्यक्त पुस्तकाची २

إِنَّا أَنزَلْنَاهُ فِي لَيْلَةٍ مُّبَارَكَةٍ ۚ إِنَّا كُنَّا مُنذِرِينَ ﴿٣﴾

खचित्च आम्ही याला शुभ रात्रीत प्रकट केले आहे.[५] नि:संशय आम्ही भिवविणारे आहोत[६] ३

فِيهَا يُفْرَقُ كُلُّ أَمْرٍ حَكِيمٍ ﴿٤﴾

याच रात्रीत प्रत्येक मजबुत कामाचा निर्णय घेतला जातो.[७] ४

أَمْرًا مِّنْ عِندِنَا ۚ إِنَّا كُنَّا مُرْسِلِينَ ﴿٥﴾

आमच्या हुकूमाने[८] आम्हीच पैगंबर बनवून पाठविणारे आहोत ५

رَحْمَةً مِّن رَّبِّكَ ۚ إِنَّهُ هُوَ السَّمِيعُ الْعَلِيمُ ﴿٦﴾

आपल्या पालनकर्त्याच्या[९] दयेने, तो ऐकणारा आणि जाणणारा आहे. ६

رَبِّ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا ۖ إِن كُنتُم مُّوقِنِينَ ﴿٧﴾

जो आकाशांचा आणि पृथ्वीचा पालनकर्ता आहे, आणि जे काही त्यांच्या दर्म्यान आहे, जर तुम्ही विश्वास ठेवणारे असाल ७

لَا إِلَٰهَ إِلَّا هُوَ يُحْيِي وَيُمِيتُ ۖ رَبُّكُمْ وَرَبُّ آبَائِكُمُ الْأَوَّلِينَ ﴿٨﴾

त्याच्या वाचून अन्य कोणी उपास्य नाही. तोच जिववितो आणि तोच मारतो. तोच तुमचा आणि तुमच्या वाडवडीलांचा[१०] पालनकर्ता आहे. ८

بَلْ هُمْ فِي شَكٍّ يَلْعَبُونَ ﴿٩﴾

किंबहुना ते संशयात पडले आहेत. खेळण्या बागडण्यात पडले आहेत[११] ९

१) म्हणजे इहलोकांत ज्या मूर्तींची हे उपासना करीत आहे, असे समजून की हे अल्लाहजवळ आमची शिफारस करतील. या उपास्यांना शिफारशीचा मुळीच कोणी अधिकार असणार नाही.

२) सत्त्य गोष्टीने अभिप्रेत, कलम-ए-तौहिद 'ला इलाहा इल्लल्लाह' आहे. आणि हे मानणे पण ज्ञान आणि अंतरदृष्टीच्या आधारावर असावे. निव्वळ एक रिवाज आणि अंधानुकरणाने नसावी. म्हणजे तोंडाने कलम-ए-तौहिद म्हणणाऱ्याला याची जाणीव असावी की, याच्यात फक्त एक अल्लाहला मान्यता, आणि दुसऱ्या तमाम उपास्यांचे खंडन आहे; मग त्याच्याप्रमाणे त्याचे कर्म असावे. अशा लोकांच्या बाबतीत, शिफारस करण्याचा हक्क फक्त अशा लोकांना मिळेल जे सत्त्याला मान्य करणारे असतील, म्हणजे पैगंबर, सदाचरणी लोक, आणि देवदूत न की

निरर्थक उपास्यांना, ज्यांना मुशरिक लोक आपले शिफारसकर्ते मानतात.

३) अल्लाहच्या जवळच कयामत आणि आपल्या पैगंबरांच्या गाऱ्हाण्यांचे ज्ञान आहे.

४) म्हणजे धर्माच्या बाबतीत माझा आणि तुमचा मार्ग वेगवेगळा आहे. जर तुम्ही माघार घेत नाही, तर आपले कर्म आचरित रहा, मी आपले काम करीत आहे; लवकरच ठाऊक होऊन जाईल की खरा कोण आहे आणि खोटा कोण ?

५) बरकतवाली रात्र ने अभिप्रेत शबे कद्र (लय्लतुल कद्र) आहे. जसा की दुसऱ्या ठिकाणी खुलासा आहे. ''रमजानच्या महिन्यांत कुरआन अवतरीत केले गेले. '' (सू.बकर : १८५) ''आम्ही हे कुरआन शबे कद्रमध्ये अवतरीत केले. (सू.कद्र-१) ही शबे कद्र रमजानच्या शेवटच्या दशकांतील विषम रात्रींतूनच कोणी एक रात्र असते. येथे कद्रच्या त्या रात्रीला बरकतवाली रात्र ठरविण्यांत आले आहे. इच्या बरकतवाली होण्यांत काय शंका असूशकते की एक तर इच्यात कुरआनाचे प्रकटीकरण झाले. दुसरे इच्यांत देवदूत आणि रूहचे अवतरण होत असते. तिसरे, इच्यात संपूर्ण वर्षांत होणाऱ्या घटनांचा निर्णय करण्यात येतो, (जसे की पुढे येत आहे.) चवथे, या रात्रीची उपासना हजार महिन्या (म्हणजे ८३ वर्षे आणि चार महिन्यां) च्या उपासनेपेक्षा उत्तम आहे. शबे कद्रमध्ये कुरआनाचे अवतरण होण्याचा अर्थ हा आहे की, याच रात्रीपासून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर, कुरआन मजीदचे अवतरण सुरू झाले. म्हणजे पहिल्या प्रथम याच रात्री आपल्यावर कुरआनाचे अवतरण सुरूं झाले. किंवा हा अर्थ आहे की, लौहे महफुजमधून याच रात्रींत कुरआन बैतुल इज्जतमध्ये उतारण्यांत आले, जे जमिनीच्या आकाशांत आहे. मग तेथून आवश्यकतेप्रमाणे आणि प्रयोजनानुसार, २३ वर्षात निरनिराळ्या वेळी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर अवतरीत होत राहिले. काही लोकांनी लयलय मुबारका ने शाबान ची पंधरावी रात्र अभिप्रेत धरली आहे. परंतु हे बरोबर नाही. जेव्हाकी कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याने (नस्स) कुरआनाचे अवतरण शबे कद्रमध्ये सिद्ध आहे. तर याच्याने शबे बरात अभिप्रेत धरणे कुठल्याही प्रकारे बरोबर नाही. याशिवाय शबे बारात (शाबान ची पंधरावी रात्र) च्या बाबतीत जेवढ्या पण रिवायती येतात, ज्यांच्यात इच्या महात्म्याचे वर्णन आहे. किंवा याच्यांत तिला निर्णयाची रात्र म्हटली गेली आहे; तर या सर्व रिवायती सनद् च्या दृष्टीने 'जईफ' (अमान्य) आहेत. ह्या कुरआनाच्या स्पष्ट महावाक्याचा (नस्सचा) मुकाबला कशा प्रकारे करूंशकतात?

६) म्हणजे कुरआनाच्या अवतरणाचा उद्देश्य लोकांना फायदा, आणि इस्लामच्या शास्त्रीय नफा नुकसानापासून सावध करणे आहे. कारण की, यावर तर्क पूर्ण होऊन जावा.

७) 'युफ्रको' म्हणजे निर्णय करून दिला जातो आणि देवदुत आणि संबंधितांच्या हवाली करून देण्यांत येतो. 'हकीम' शहाणपणाने परिपूर्ण च्या अर्थात की, अल्लाहचे प्रत्येक कामच बुद्धीयुक्त असते. किंवा 'मुहकम' (मजबुत पक्के) ज्याच्यात बदल किंवा फेरफाराची शक्यता नाही. सहाबा आणि ताबिईनकडून याच्या भाष्यांत नमुद आहे की, या रात्रीत, येणाऱ्या वर्षाच्या बाबतीत मृत्यु आणि जीवन, आणि जीवनाच्या संदर्भात निर्णय, लौहे महफुज मधून उतारुन देवदुतांच्या हवाली करून देण्यात येतात. (इब्ने कसीर).

८) म्हणजे सारे निर्णय आमचा हुकूम व फर्मान आणि आम्ही ठरविल्याप्रमाणे आणि आमच्या मर्जींप्रमाणे होत असतात.

९) म्हणजे पुस्तकाच्या अवतरणाबरोबर, पैगंबरांना पाठविणे हा पण आमच्या दयेचा एक भाग आहे. कारण की त्यांनी आमच्या अवतरीत केलेल्या पुस्तकाला स्पष्ट करून सांगावे, आणि आमचे आदेश लोकांपर्यंत पोहचवावे. अशा तऱ्हेने स्वाभाविक आवश्यकतांच्या भरपाईबरोबर, आम्ही आपल्या दयेने, लोकांच्या अध्यात्मिक तगाद्यांच्या परिपूर्णतेचा पण सामान उपलब्ध करून दिला.

१०) ही महावाक्ये सुद्धा सू.आओराफच्या महावाक्याप्रमाणे आहेत. ''आपण सांगून द्या की अहो लोकांनो ! मी तुम्हांसर्वांकडे, त्या अल्लाहकडून पाठविलेला आहे, ज्याचे राज्य सर्व आकाशांत आणि पृथ्वीत आहे. त्याच्या वांचून अन्य कोणी उपासनेच्या योग्य नाही. तोच जीवन देतो आणि तोच मृत्यू देतो.'' (सू.आओराफ-१५८)

११) म्हणजे सत्य आणि त्याची प्रमाणे त्याच्यासमोर येऊन पोहचली. परंतु त्यांनी याच्यावर ईमान आणण्याच्या ऐवजी, शंकेत पडले आहेत. आणि या शंकेबरोबर हंसे उडविण्यांत आणि खेळण्यात कुदण्यात मग्न आहेत.

فَارْتَقِبْ يَوْمَ تَأْتِي السَّمَآءُ بِدُخَانٍ مُّبِينٍ ﴿١٠﴾

**आपण त्या दिवसाची वाट पहा. जेव्हाआकाशातून एक धूर प्रकट होईल.** [१] (१०)

يَّغْشَى النَّاسَ ۖ هٰذَا عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١١﴾

**जो लोकांना घेरून घेईल. ही दु:खदायक शिक्षा आहे.** (११)

رَبَّنَا اكْشِفْ عَنَّا الْعَذَابَ إِنَّا مُؤْمِنُونَ ﴿١٢﴾

**ते म्हणतील हे आमच्या पालनकर्त्या ! हे संकट आमच्यावरुन दूर कर. आम्ही ईमान मान्य करीत आहोत** [२] (१२)

أَنَّىٰ لَهُمُ الذِّكْرَىٰ وَقَدْ جَآءَهُمْ رَسُولٌ مُّبِينٌ ﴿١٣﴾

**यांच्याकरीता उपदेश कोठे आहे ? स्पष्ट करून सांगणारे पैगंबर यांच्याजवळ येऊन चुकलेत.** (१३)

ثُمَّ تَوَلَّوْا عَنْهُ وَقَالُوا مُعَلَّمٌ مَّجْنُونٌ ﴿١٤﴾

**तरी सुद्धां यांनी त्यांच्या कडून तोंड फिरविले आणि सांगून टाकले की, हा शिकविलेला पढविलेला खुळा आहे.** (१४)

إِنَّا كَاشِفُوا الْعَذَابِ قَلِيلًا ۚ إِنَّكُمْ عَآئِدُونَ ﴿١٥﴾

**आम्ही शिक्षेला जरा हटवून टाकू, तर तुम्ही पुन्हांआपल्या याच स्थितीवर येऊन जाल.** (१५)

يَوْمَ نَبْطِشُ الْبَطْشَةَ الْكُبْرَىٰ ۚ إِنَّا مُنْتَقِمُونَ ﴿١٦﴾

**ज्या दिवशी आम्ही मोठी पकड पकडू.** [३] **खचित्च आम्ही बदला घेणारे आहोत** (१६)

وَلَقَدْ فَتَنَّا قَبْلَهُمْ قَوْمَ فِرْعَوْنَ وَجَآءَهُمْ رَسُولٌ كَرِيمٌ ﴿١٧﴾

**खचित्च यांच्यापूर्वी आम्ही फिरऔनच्या लोकांना (सुद्धा) अजमाऊन चुकलो आहोत.** [४] **ज्यांच्याजवळ (अल्लाहचा) प्रतिष्ठित पैगंबर आला.** (१७)

१) हे त्या काफिरांसाठी धमकावणे आहे की, ठिक आहे, तुम्ही त्या दिवसाची वाट पहा, की जेव्हा आकाशावर धूर दिसू लागेल. याच्या अवतरण्याच्या कारणांत सांगितले गेले आहे की, मक्केवाल्यांच्या शत्रुसारख्या वागणुकीने त्रासून, नबी ﷺ नी, त्यांच्यासाठी दुष्काळाचा शाप केला. ज्याच्या परिणामात, त्यांच्यावर दुष्काळाची शिक्षा अवतरीत करून देण्यात आली. येथपावेतो की ते हाडे,चामडी आणि मुर्दाड वगैरे खाण्यास लाचार होऊन गेलेत. आकाशाकडे पहात, तेव्हा त्यांना भूक आणि अशक्त पणाच्या तिव्रतेने धुरासारखे दिसे. सरशेवटी कंटाळून नबी ﷺ च्या सेवेत हजर झालेत. आणि जर ही शिक्षा टळली तर ईमान आणण्याचे वचन दिले. परंतु ही स्थिती दूर होतांच, त्यांचा कुफ्र आणि अहंकार पुन्हा पलटून आला. म्हणून पुन्हा बद्रच्या युद्धांत त्यांची सक्त पकड करण्यात आली. (स.बुखारी, किताबुत् तफसीर) काही म्हणतात की, कयामतच्या जवळच्या दहा मोठमोठ्या चिन्हांतून एक मोठे चिन्ह धूरपण आहे. ज्याच्याने काफिरांवर जास्त परिणाम होईल. आणि ईमानवाल्यांवर फार कमी. या महावाक्यांत याच धुराचे वर्णन आहे. या भाष्याच्या अनुषंगाने, हे चिन्ह कयामतच्या जवळ जाहीर होईल. जेव्हाकी, पहिल्या भाष्याच्या अनुषंगाने हे जाहीर होऊन चुकले. इमाम शौकानी म्हणतात, दोन्ही गोष्टी आपआपल्या जागी योग्य आहेत. त्याच्या अवतरणाच्या कारणाच्या अनुषंगाने ही घटना घडून चुकली आहे. जी सही सनदने सिद्ध आहे. तथापि कयामतच्या चिन्हांमध्ये सुद्धा, याचा उल्लेख सहीह हदीसींमध्ये आला आहे. म्हणून तो पण याच्या विरूद्ध नाही. त्यावेळी पण तो जाहीर होईल.

२) पहिल्या भाष्याच्या अनुषंगाने हे मक्केच्या काफिरांनी म्हटले; आणि दुसऱ्या भाष्याच्या अनुषंगाने कयामतच्याजवळ काफिर म्हणतील.

३) याच्याने अभिप्रेत बद्रच्या युद्धाची पकड आहे. ज्याच्यांत ७० काफिर मारले गेले आणि सत्तर कैदी बनविण्यांत आले. दुसऱ्या भाष्याच्या अनुषंगाने ही सक्त पकड कयामतच्या दिवशी होईल. इमाम शौकानी म्हणतात, हा त्या खास पकडीचा उल्लेख आहे, जी बद्रच्या युद्धांत झाली कारण की, कुरैशच्या संदर्भातच याचा उल्लेख आहे. जरी कयामतच्या दिवशी सुद्धा अल्लाहतआला सक्त पकड करील, तथापि ती पकड सर्वांसाठी असेल, प्रत्येक आज्ञाभंजक त्यांच्यात शामील असेल.

४) आजमाविण्याचा अर्थ हा आहे की, आम्ही त्यांना ऐहिक आनंद, सुसंपन्नता व निष्काळजीपणा बहाल केला. मग आमचा सन्मानीत पैगंबर पण त्यांच्याकडे पाठविला. परंतु त्यांनी अल्लाहचे न आभार मानले, न पैगंबरावर ईमान आणले.

اَنۡ اَدُّوۡۤا اِلَىَّ عِبَادَ اللّٰهِ ؕ اِنِّىۡ لَـكُمۡ رَسُوۡلٌ اَمِيۡنٌ ۙ﴿۱۸﴾

की, अल्लाहतआलाच्या सेवकांना माझ्या हवाली करून टाका. [१] विश्वास ठेवा की मी तुमच्याकरीता प्रामाणिक पैगंबर आहे. [२] ⑱

وَّاَنۡ لَّا تَعۡلُوۡا عَلَى اللّٰهِ ۚ اِنِّىۡۤ اٰتِيۡكُمۡ بِسُلۡطٰنٍ مُّبِيۡنٍ ۚ﴿۱۹﴾

तुम्ही अल्लाहतआलाच्या समोर शिरजोरी करू नका. [३] मी तुमच्या जवळ स्पष्ट प्रमाण आणणार आहे. [४] ⑲

وَاِنِّىۡ عُذۡتُ بِرَبِّىۡ وَرَبِّكُمۡ اَنۡ تَرۡجُمُوۡنِ ۚ﴿۲۰﴾

आणि मी आपल्या आणि तुमच्या पालनकर्त्याच्या आश्रयांत येतो. यापासून की तुम्ही मला धोंडमार कराल. [५] ⑳

وَاِنۡ لَّمۡ تُؤۡمِنُوۡا لِىۡ فَاعۡتَزِلُوۡنِ ﴿۲۱﴾

आणि जर तुम्ही माझ्यावर ईमान आणित नाही तर माझ्यापासून विभक्तच रहा. [६] ㉑

فَدَعَا رَبَّهٗۤ اَنَّ هٰٓؤُلَاۤءِ قَوۡمٌ مُّجۡرِمُوۡنَ ﴿۲۲﴾ الثلثة

मग त्यांनी आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना केली की हे सर्व गुन्हेगार लोक आहेत [७] ㉒

فَاَسۡرِ بِعِبَادِىۡ لَيۡلًا اِنَّكُمۡ مُّتَّبَعُوۡنَ ۙ﴿۲۳﴾

(आम्ही सांगून दिले की,) रातोरात तूं माझ्या सेवकांना घेऊन निघून जा. खचित्‌च तुमचा पाठलाग केला जाईल. [८] ㉓

وَاتۡرُكِ الۡبَحۡرَ رَهۡوًا ؕ اِنَّهُمۡ جُنۡدٌ مُّغۡرَقُوۡنَ ﴿۲۴﴾

तू समुद्राला स्थिर आणि विभक्त सोडून चालला जा; [९] नि:संशय हे सैन्य बुडवून टाकण्यात येईल. ㉔

كَمۡ تَرَكُوۡا مِنۡ جَنّٰتٍ وَّعُيُوۡنٍ ۙ﴿۲۵﴾

ते पुष्कळशा बागा [१०] आणि झरे सोडून गेलेत. ㉕

وَّزُرُوۡعٍ وَّمَقَامٍ كَرِيۡمٍ ۙ﴿۲۶﴾

आणि शेते आणि किती तरी उत्तम घरे. ㉖

وَّنَعۡمَةٍ كَانُوۡا فِيۡهَا فٰكِهِيۡنَ ۙ﴿۲۷﴾

आणि त्या सुखोपभोगाच्या वस्तू, ज्यांत ते चैन करीत होते. ㉗

كَذٰلِكَ ۖ وَاَوۡرَثۡنٰهَا قَوۡمًا اٰخَرِيۡنَ ﴿۲۸﴾

असेच झाले. [११] आणि आम्ही या सर्वांचा वारस दुसऱ्या लोकांना बनवून दिले. [१२] ㉘

فَمَا بَكَتۡ عَلَيۡهِمُ السَّمَاۤءُ وَالۡاَرۡضُ وَمَا كَانُوۡا مُنۡظَرِيۡنَ ﴿۲۹﴾ ع

तर न त्यांच्यावर आकाश आणि पृथ्वी [१३] रडले, न त्यांना अवकाश मिळाला. ㉙

وَلَقَدۡ نَجَّيۡنَا بَنِىۡۤ اِسۡرَآءِيۡلَ مِنَ الۡعَذَابِ الۡمُهِيۡنِ ۙ﴿۳۰﴾

आणि नि:संशय आम्हीच बनी इस्‌राईलला मानहानीच्या शिक्षेपासून सुटका दिली. ㉚

مِنۡ فِرۡعَوۡنَ ؕ اِنَّهٗ كَانَ عَالِيًا مِّنَ الۡمُسۡرِفِيۡنَ ﴿۳۱﴾

जी फिरऔनकडून त्यांना होत होती; खचित्‌च तो शिरजोर आणि मर्यादेच्या बाहेर जाणाऱ्यामधून होता. ㉛

وَلَقَدِ اخۡتَرۡنٰهُمۡ عَلٰى عِلۡمٍ عَلَى الۡعٰلَمِيۡنَ ۚ﴿۳۲﴾

आणि आम्ही जाणून बुझून त्यांना (बनी इस्त्राईल ला) सकल जगाच्या लोकांवर श्रेष्ठत्व दिले. [१४] ㉜

وَاٰتَيۡنٰهُمۡ مِّنَ الۡاٰيٰتِ مَا فِيۡهِ بَلٰٓؤٌا مُّبِيۡنٌ ﴿۳۳﴾

आणि आम्ही त्यांना अशा अशा निशाण्या दिल्यांत, ज्यांत उघड उघड त्यांची कसोटी होती. [१५] ㉝

اِنَّ هٰٓؤُلَاۤءِ لَيَقُوۡلُوۡنَ ۙ﴿۳۴﴾

हे लोक तर हेच [१६] म्हणतात. ㉞

१) इबादल्लाह्‌ ने अभिप्रेत येथे मूसा عليه السلام चे लोक बनी इस्‌राईल आहेत, ज्यांना फिरऔनने गुलाम बनवून ठेवले होते. ह.मूसा عليه السلام नी आपल्या लोकांच्या स्वातंत्र्याची मागणी केली.

२) अल्लाहचा संदेश पोहचविण्यांत प्रामाणिक आहे.

३) म्हणजे त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालनाला नकार देऊन, अल्लाहच्यासमोर आपल्या मोठेपणाचे आणि शिरजोरीचे प्रदर्शन करू नका.

४) ही यापूर्वीची सबब आहे की, मी असा स्पष्ट तर्क बरोबर आणला आहे, ज्याला नाकारण्याला काहीही वावच नाही.
५)या आवाहन आणि प्रचाराच्या उत्तरांत, फिरऔनाने ह.मूसा عليه السلام ला ठार मारण्याची धमकी दिली. ज्यावर त्यांनी आपल्या पालनकर्त्याकडे आश्रय मागितला.
६) म्हणजे जर माझ्यावर ईमान आणत नाहीत, तर आणू नका; परंतु मला ठार करण्याचा किंवा त्रास देण्याचा प्रयत्न करू नका.
७) म्हणजे जेव्हा त्यांनी पाहिले की, आवाहनाचा परिणाम कबूल करण्याऐवजी, त्याचे कुफ्र आणि अहंकार आणखी वाढला. तर अल्लाहच्या समोर प्रार्थनेसाठी हात पसरवून दिले.
८) म्हणून अल्लाहने प्रार्थना मान्य केली. आणि त्यांना हुकूम दिला की, बनी इस्राईलला रातोरात घेऊन, येथून निघून जा. आणि पहा! घाबरू नका! तुमचा पाठलाग पण होईल.
९) 'रहवा' म्हणजे स्थिर किंवा कोरडा. अर्थ हा आहे की, तुझी लाठी मारण्याने, समुद्र चमत्कारिक रीत्या, स्थिर किंवा कोरडा होऊन जाईल. आणि त्याच्यात रस्ता बरून जाईल. तुम्ही समुद्र पार केल्यानंतर, त्याला याच अवस्थेत सोडून द्यावे की, फिरऔन आणि त्याचे सैन्य सुद्धा, समुद्राला पार करण्याच्या उद्देशाने, त्याच्यांत दाखल होऊन जावे. आणि आम्ही त्यांस तेथेच बुडवून टाकावे. आणि झालेही असेच. जसा की पूर्वी तपशील येऊन चुकला.
१०) नाईल नदीच्या दोन्ही किनारी, बागा आणि शेतीची विपुलता होती. आलीशान इमारती आणि सुखसंपन्नतेची लक्षणे होती. सर्व काही येथेच जगांतच राहून गेले. आणि धडा घेण्यासाठी फिरऔन आणि त्याच्या लोकांचे नांव राहून गेले.
११) म्हणजे हा मामला असाच झाला, ज्याप्रमाणे सांगितला गेला आहे.
१२) काहींच्या जवळ याच्याने अभिप्रेत नबी इस्राईलचे पुन्हा इजिप्तला येणे इतिहासने सिद्ध नाही. म्हणून इजिप्त देशाचे वारस, आणखी कोणी लोक बनले, बनी इस्राईल नाही.
१३) म्हणजे या फिरऔनी लोकांचे सुकृत्येच नव्हते, जी आकाशावर चढती. आणि त्यांचा वंश खंडित होण्यावर आकाश रडले असते न पृथ्वीवर ते अल्लाहची उपासना करीत होते, की त्यांच्यापासून वंचित् झाल्याने जमीन रडती. अर्थ हा की, आकाश आणि पृथ्वीमधून कोणी सुद्धा, त्यांच्या गारद होण्यावर, रडणारा नव्हता.
१४) या जगाने अभिप्रेत, बनी इस्राईलच्या काळातील जग आहे. सर्व जग नाही. कारण की कुरआनांत उम्मते मुहम्मदीया عليه السلام ला 'कुनतुम खैर उम्मत' च्या उपाधीने, संबोधण्यात आले आहे. म्हणजे बनी इस्राईल आपल्या काळांत, जगांतील सर्व लोकांत श्रेष्ठत्व राखत होते. यांचे हे श्रेष्ठत्व त्या योग्यतेमुळे होते, ज्याचे ज्ञान अल्लाहला आहे.
१५) आयातने अभिप्रेत ते चमत्कार आहेत, जे ह.मूसा عليه السلام ला दिले गेले होते. याच्यांत कसोटीचा भाग हा होता की, अल्लाहतआलाने पहावे की ते कशी कर्मे करतात? किंवा आयातने अभिप्रेत ते उपकार आहेत, जे अल्लाहने त्यांच्यावर केलेत. उदाहरणार्थ फिरऔनींना बुडवून त्यांना मुक्ती देणे, त्यांच्या करीतां समुद्राला विभागून रस्ता बनवून देणे. ढगांची सावली आणि मन्न व सल्वाचे उतारणे, वगैरे. याच्यांत कसोटी ही आहे की, या उपकारांच्या बदल्यांत हे लोक अल्लाहतआलाच्या आज्ञापालनाचा मार्ग अवलंबितात की त्याच्याशी कृतघ्नता करीत, त्याच्याशी बंडखोरी आणि शिरजोरीचा मार्ग अंगीकारतात.
१६) हा इशारा मक्केच्या काफिरांकडे आहे. यासाठी की संभाषणाचा क्रम, त्यांच्याशीच संबोधित आहे. दर्म्यान फिरऔनाची गोष्ट त्यांच्या तंबीसाठी सांगण्यांत आली आहे की, फिरऔन सुद्धा, यांच्यासारखा कुफ्रवर अडून राहिला होता. पाहून घ्या ! त्याचा काय परिणाम झाला. जर हे सुद्धा आपल्या कुफ्र व शिर्कवर अडिग राहिले, तर त्यांचा परिणाम सुद्धां, फिरऔन आणि त्याच्या मानणाऱ्यांपेक्षा वेगळा होणार नाही.

| | |
|---|---|
| की (शेवटची गोष्ट) हेच आमचे पहिल्या वेळेत (जगांतून) मरून जाणे आहे; आणि [१] आम्ही दुसऱ्यांदा उठविले जाणार नाहीत ३५ | إِنْ هِيَ إِلَّا مَوْتَتُنَا الْأُولَىٰ وَمَا نَحْنُ بِمُنشَرِينَ ﴿٣٥﴾ |
| जर तुम्ही खरे आहांत, तर आमच्या वाडवडीलांना घेऊन [२] या पाहू! ३६ | فَأْتُوا بِآبَائِنَا إِن كُنتُمْ صَادِقِينَ ﴿٣٦﴾ |
| काय हे लोक उत्तम आहेत की, 'तुब्बा' चे लोक, आणि जे यांच्यापण पूर्वी होते. आम्ही त्या सर्वांना गारद करून टाकले. खचित्‌च ते गुन्हेगार होते. [३] ३७ | أَهُمْ خَيْرٌ أَمْ قَوْمُ تُبَّعٍ وَالَّذِينَ مِن قَبْلِهِمْ ۚ أَهْلَكْنَاهُمْ ۖ إِنَّهُمْ كَانُوا مُجْرِمِينَ ﴿٣٧﴾ |
| आम्ही आकाश आणि पृथ्वी आणि त्यांच्या दर्म्यान वस्तुंना, खेळ करण्यासाठी निर्माण केले नाही. [४] ३८ | وَمَا خَلَقْنَا السَّمَاوَاتِ وَالْأَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا لَاعِبِينَ ﴿٣٨﴾ |
| किंबहुना आम्ही त्यांना (कोण्या) सत्य संकल्पानेच निर्माण केले आहे; [५] होय! परंतु बहुतेक लोक जाणत नाही. [६] ३९ | مَا خَلَقْنَاهُمَا إِلَّا بِالْحَقِّ وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٣٩﴾ |
| नि:संशय निर्णयाचा दिवस, या सर्वांचा निश्चित आहे. [७] ४० | إِنَّ يَوْمَ الْفَصْلِ مِيقَاتُهُمْ أَجْمَعِينَ ﴿٤٠﴾ |

१) म्हणजे हे जगातील जीवनच शेवटचे जीवन आहे. याच्यानंतर दुसऱ्यांदा जिवंत होणे आणि (कर्मांचा) हिशेब होणे, शक्य नाही.

२) हे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि मुसलमानांना, काफिरांकडून सांगण्यांत येत आहे की, जर तुमची ही धारणा खरोखर बरोबर आहे की दुसऱ्यांदा जिवंत होणे आहे, तर आमच्या वाडवडीलांना जिवंत करून दाखवून द्या. हे त्यांचे भांडण आणि निरर्थक हुज्जत होती. कारण की दुसऱ्यांदा जिवंत करण्याची धारणा कयामतशी संबंधीत आहे. न की, कयामतच्या पहिले जगांत जिवंत होऊन जाणे किंवा करून देणे.

३) म्हणजे हे मक्केचे काफिर काय, तुब्बा आणि त्यांच्या पूर्वीचे लोक आद आणि समूद वगैरे पेक्षांजास्त बलवान आणि उत्तम आहेत. जेव्हांआम्ही त्यांना त्यांच्या गुन्ह्यांच्या परिणामांत, यांच्यापेक्षा जास्त सामर्थ्य आणि शक्ती असून सुद्धा, गारद करून टाकले, तर यांची काय बिशात? तुब्बाने अभिप्रेत सबाचे लोक आहेत. सबामध्ये हमीर घराणे होते. हे आपल्या बादशाहला तुब्बा म्हणत असत. जसे रुमच्या बादशाहला कैसर, इराणच्या बादशाहला किसरा, इजिप्तच्या सत्ताधिशांना फिरऔन आणि हबशाच्या (इथोपिया) शासनकर्त्यांना नज्जाशी, म्हटले जात होते. इतिहासकारांचे यावर एकमत आहे की, तुब्बांमधून काही तुब्बांचा फारच उत्कर्ष झाला. येथपर्यंत की काही इतिहासकारांनी येथपर्यंत सांगून टाकले की, तो देशांना पादाक्रांत करीत करीत, समरकंद पर्यंत पोहचून गेला. अशा प्रकारे आणखी कित्येक मोठे बादशाह या लोकांत होऊन गेलेत. आणि आपल्या काळातील हे एक श्रेष्ठ लोक होते. जी सामर्थ्य आणि शक्ती, आणि ऐश्वर्य व सुसंपन्नता यामध्ये विशेष प्रसिद्ध होती. परंतु जेव्हा या लोकांनी सुद्धा, पैगंबरांना खोटे ठरवले तर त्यांना नष्ट करून टाकण्यांत आले. (तपशिला करीतां पहावे सू.सबाची संबंधीत महावाक्ये) हदीसमध्ये एका 'तुब्बा' च्या बाबतीत येते की तो मुसलमान होऊन गेला होता. त्याला बरे वाईट म्हणूं नका. (मजमुअल जवाईद) तथापि त्यांची बहुसंख्या आज्ञाभंजकांचीच राहिली आहे. ज्यामुळे नष्ट होणे त्यांचे दैव बनले.

४) हा विषय याच्यापूर्वी सू.सॉद-२७,सू.मुअमिनून-११५-११६, सू.हिज्र-८५ वगैरे मध्ये सांगण्यात आला आहे.

५) तो उद्देश्य किंवा योग्य युक्ती हीच आहे की, लोकांची कसोटी घेतली जावी. आणि सदाचरणी लोकांना, त्यांच्या पुण्याचे प्रतिफळ आणि कुकृत्ये करणाऱ्यांना त्यांच्या पापांची शिक्षा दिली जावी.

६) म्हणजे ते या उद्देश्यापासून गाफिल आणि अजाण आहेत. म्हणून परलोकाच्या तयारीकडे दुर्लक्ष करतात आणि इहलोकात मग्न असतात.

७) हाच तो मूळ उद्देश्य आहे, ज्यासाठी मनुष्यांना निर्माण केले गेले आहे. आणि आकाश आणि पृथ्वीची निर्मिती केली गेली आहे.

يَوْمَ لَا يُغْنِىْ مَوْلًى عَنْ مَّوْلًى شَيْـًٔا وَّلَا هُمْ يُنْصَرُوْنَ ﴿٤١﴾

या दिवशी कोणी मित्र कोण्या मित्राच्या काहीच कामा येणार नाही. आणि न त्यांची मदत केली जाईल.[१] (४१)

اِلَّا مَنْ رَّحِمَ اللّٰهُ ؕ اِنَّهٗ هُوَ الْعَزِيْزُ الرَّحِيْمُ ﴿٤٢﴾

परंतु ज्यावर अल्लाहची दया होईल, तो परम समर्थ आणि दयाळूआहे. (४२)

اِنَّ شَجَرَتَ الزَّقُّوْمِ ﴿٤٣﴾

नि:संशय निवडुंगाचे झाड, (४३)

طَعَامُ الْاَثِيْمِ ﴿٤٤﴾

गुन्हेगारांचा आहार आहे. (४४)

كَالْمُهْلِ ۚ يَغْلِىْ فِى الْبُطُوْنِ ﴿٤٥﴾

जे खाली बसलेल्या[२] गाळासारखे आहे, आणि पोटात उकळत रहाते. (४५)

كَغَلْىِ الْحَمِيْمِ ﴿٤٦﴾

जसे उकळ आलेले गरम पाणी[३] (४६)

خُذُوْهُ فَاعْتِلُوْهُ اِلٰى سَوَآءِ الْجَحِيْمِ ﴿٤٧﴾

त्याला पकडून घ्या, मग ओढत ओढत नरकाग्नीच्या मध्यापर्यंत पोहचवून द्या.[४] (४७)

ثُمَّ صُبُّوْا فَوْقَ رَاْسِهٖ مِنْ عَذَابِ الْحَمِيْمِ ﴿٤٨﴾

मग त्याच्या डोक्यावर उकळी आलेले पाणी ओता. (४८)

ذُقْ ۚ اِنَّكَ اَنْتَ الْعَزِيْزُ الْكَرِيْمُ ﴿٤٩﴾

(मग त्याला सांगण्यांत येईल घे या शिक्षेची गोडी) चाख. तू तर मोठा अब्रुदार आणि मोठा आदरणीय होता.[५] (४९)

اِنَّ هٰذَا مَا كُنْتُمْ بِهٖ تَمْتَرُوْنَ ﴿٥٠﴾

हीच तर ती वस्तूंआहे ज्यांत तुम्ही शंका करीत होता. (५०)

اِنَّ الْمُتَّقِيْنَ فِىْ مَقَامٍ اَمِيْنٍ ﴿٥١﴾

नि:संशय (अल्लाहला) भिणारे अभय आणि चैनीच्या जागी असतील. (५१)

فِىْ جَنّٰتٍ وَّعُيُوْنٍ ﴿٥٢﴾

बागा आणि झऱ्यात (५२)

يَّلْبَسُوْنَ مِنْ سُنْدُسٍ وَّاِسْتَبْرَقٍ مُّتَقٰبِلِيْنَ ﴿٥٣﴾

बारीक आणि तलम रेशमाची वस्त्रे परिधान करून, समोरासमोर बसले असतील[६] (५३)

كَذٰلِكَ ۟ وَزَوَّجْنٰهُمْ بِحُوْرٍ عِيْنٍ ﴿٥٤﴾

हे अशाचप्रकारे आहे.[७] आणि आम्ही मोठ्या डोळ्यांवाल्या अप्सरांशी त्यांची लग्ने करून देऊ.[८] (५४)

१) जसे फर्माविले, ''मग जेव्हा की सूर फुंकून दिला जाईल, त्या दिवशी न आपसांत नाते संबंधच राहतील.'' (सू.मुअमिनुन-१०१) ''आणि कोणी मित्र कोण्या मित्राला विचारणार नाही.'' (सू.मआरिज-१०)

२) 'मुह्ल' वितुळलेले तांबे, अग्नीत वितळलेली वस्तू, किंवा तळाशी बसलेला गाळ, तेल वगैरेच्या शेवटी जो गढुळसा मातीचा थर राहून जातो तो.

३) तो निवडुंगाचा आहार, उकळत्या पाण्यासारखा पोटांत ढवळेल.

४) हे नरकाग्नीवर तैनात केलेल्या देवदूतांना सांगण्यात येईल. 'सवाअ' मधोमध या अर्थांत.

५) म्हणजे इहलोकांत तर आपल्याला मोठा प्रतिष्ठीत आणि आदर सन्मानवाला बनून फिरत होता. ईमानवाल्यांना तुच्छ दृष्टीने पहात होता.

६) कुफ्र आणि आज्ञाभंग करणाऱ्यांच्या मुकाबल्यात, ईमान आणि ईशभयवाल्यांचे स्थान वर्णन केले जात आहे. ज्यांनी आपल्या स्वत:ला कुफ्र, आज्ञाभंजन आणि गुन्ह्यांपासून वांचवून ठेवले होते. 'अमीन' चा अर्थ अशी जागा जेथे, प्रत्येक प्रकारच्या भय आणि भीतीपासून ते सुरक्षित राहतील.

७) म्हणजे अल्लाहला भिणाऱ्यांबरोबर खचित्‌च असा मामला केला जाईल.

८) हूर, हव्राअ चे अनेकवचन आहे. पांढऱ्या शुभ्र अप्सरा यासाठी म्हणण्यात येते की, दृष्टी त्यांचे रुप सौंदर्य पाहून, आश्चर्यचकीत होऊन जाईन. 'ईन' अईना चे अनेकवचन आहे. मोठ्या डोळ्यांवाली, जसे हरणाचे डोळे असतात. आम्ही पूर्वी खुलासा करून आलो आहोत की, प्रत्येक स्वर्गवाश्याला कमीत कमी दोन अप्सरा अवश्य मिळतील. ज्या रुप सौंदर्याच्या अनुषंगाने फारच सुंदर असतील. तथापि तिर्मिझीच्या एका रिवायतीप्रमाणे ठाऊक होते, ज्याला सहीह म्हटले गेले आहे, की शहीदला विशेष म्हणून ७२ हुरा मिळतील. (अबवाब फजाईलुल जिहाद, बाब माजाअ इन्नास अफजल)

يَدْعُونَ فِيهَا بِكُلِّ فَاكِهَةٍ آمِنِينَ ۵۵

निश्चित होऊन तेथे, प्रत्येक प्रकारचे मेवे मागवत असतील.[१] (५५)

لَا يَذُوقُونَ فِيهَا الْمَوْتَ إِلَّا الْمَوْتَةَ الْأُولَىٰ ۚ
وَوَقَاهُمْ عَذَابَ الْجَحِيمِ ۵۶

तेथे ते मृत्यू चाखणार नाही. परंतु पहिला मृत्यू, (जो ते मरून चुकले)[२] त्यांना अल्लाहतआलाने नरकाग्नीच्या शिक्षेपासून वाचवून घेतले. (५६)

فَضْلًا مِّن رَّبِّكَ ۚ ذَٰلِكَ هُوَ الْفَوْزُ الْعَظِيمُ ۵۷

ही फक्त तुझ्या पालनकर्त्याची कृपा आहे.[३] हेच आहे मोठे साफल्य (५७)

فَإِنَّمَا يَسَّرْنَاهُ بِلِسَانِكَ لَعَلَّهُمْ يَتَذَكَّرُونَ ۵۸

आम्ही या (कुरआनाला) तुझ्या भाषेत सोपे करून दिले आहे, कारण की, त्यांनी उपदेश ग्रहण करावा. (५८)

३ १७ १६ فَارْتَقِبْ إِنَّهُم مُّرْتَقِبُونَ ۵۹

३ १७ १६ आता तू वाट पहा; हे पण वाट पाहात आहेत.[४] (५९)







حم ۱

हा-मीम- (१)

تَنزِيلُ الْكِتَابِ مِنَ اللَّهِ الْعَزِيزِ الْحَكِيمِ ۲

हे पुस्तक समर्थ आणि बुद्धीमान अल्लाहकडून अवतरीत झाले आहे. (२)

إِنَّ فِي السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ لَآيَاتٍ لِّلْمُؤْمِنِينَ ۳

आकाश आणि पृथ्वीमध्ये ईमानवाल्यांसाठी खचित्च पुष्कळ निशाण्या आहेत (३)

وَفِي خَلْقِكُمْ وَمَا يَبُثُّ مِن دَابَّةٍ آيَاتٌ
لِّقَوْمٍ يُوقِنُونَ ۴

आणि स्वत: तुमच्या निर्मितीमध्ये, आणि जनावरांच्या पसरविण्यांत विश्वास ठेवणाऱ्या लोकांसाठी पुष्कळच निशाण्या आहेत. (४)

وَاخْتِلَافِ اللَّيْلِ وَالنَّهَارِ وَمَا أَنزَلَ اللَّهُ مِنَ
السَّمَاءِ مِن رِّزْقٍ فَأَحْيَا بِهِ الْأَرْضَ بَعْدَ مَوْتِهَا
وَتَصْرِيفِ الرِّيحِ آيَاتٌ لِّقَوْمٍ يَعْقِلُونَ ۵

आणि रात्र दिवसाच्या बदलण्यात, आणि जी काही अन्नसंपत्ती अल्लाहतआला आकाशांतून अवतीर्ण करून, जमिनीला तिच्या मृत्यूनंतर, जिवंत करून देतो.[५] (याच्यात) आणि वाऱ्यांच्या बदलण्यात सुद्धा, त्या लोकांकरीता जे बुद्धी बाळगतात, निशाण्या आहेत[६] (५)

تِلْكَ آيَاتُ اللَّهِ نَتْلُوهَا عَلَيْكَ بِالْحَقِّ ۖ فَبِأَيِّ
حَدِيثٍ بَعْدَ اللَّهِ وَآيَاتِهِ يُؤْمِنُونَ ۶

ही अल्लाहची महावाक्ये आहेत, ज्यांना आम्ही वांचून वांचून ऐकवित आहोत; तर अल्लाहतआला आणि त्याची महावाक्ये याच्या नंतर हे कोणत्या गोष्टीवर ईमान आणतील?[७] (६)

وَيْلٌ لِّكُلِّ أَفَّاكٍ أَثِيمٍ ۷

प्रत्येक खोट्या गुन्हेगारावर दु:ख आणि खेद आहे.[८] (७)

يَسْمَعُ آيَاتِ اللَّهِ تُتْلَىٰ عَلَيْهِ ثُمَّ يُصِرُّ مُسْتَكْبِرًا
كَأَن لَّمْ يَسْمَعْهَا ۖ فَبَشِّرْهُ بِعَذَابٍ أَلِيمٍ ۸

जी अल्लाहची महावाक्ये, आपल्या समोर वांचली जातात. ती ऐकून सुद्धा गर्व करतो, आणि अशा प्रकारे उडवून लावतो, जणू ऐकलीच नाहीत.[९] तर अशा लोकांस दु:खदायक शिक्षेची खुषखबर (पोहचवून) द्या. (८)

وَإِذَا عَلِمَ مِنْ آيَاتِنَا شَيْئًا اتَّخَذَهَا هُزُوًا ۚ
أُولَٰئِكَ لَهُمْ عَذَابٌ مُّهِينٌ ۹

जेव्हा त्याला आमच्या महावाक्यांमधून कोण्या महावाक्यांची खबर मिळते, तेव्हा तो त्याची हंशी उडवितो.[१०] हेच लोक आहेत, ज्यांच्यासाठी फजितीची शिक्षा आहे. (९)

مِّن وَرَائِهِمْ جَهَنَّمُ ۖ وَلَا يُغْنِي عَنْهُم مَّا كَسَبُوا
شَيْئًا وَلَا مَا اتَّخَذُوا مِن دُونِ اللَّهِ أَوْلِيَاءَ ۖ
وَلَهُمْ عَذَابٌ عَظِيمٌ ۱۰

यांच्यामागे नरकाग्नी आहे.[११] जे काही त्यांनी मिळविले होते. ते त्यांना काहीच फायदा देणार नाही;[१२] आणि न ते (त्यांच्या काही कामा येतील,) ज्यांना त्यांनी अल्लाहशिवाय मित्र[१३] बनवून ठेवले होते. त्यांच्याकरीता तर फार मोठी शिक्षा आहे. (१०)

१) 'आमेनीन' (निर्भय होऊन) चा अर्थ यांच्या संपून जाण्याची भीती राहील, न त्यांच्या खाण्याने आजारी वगैरे पडण्याचे भय, किंवा मृत्यु, थकावट, आणि शैतानाची काही भीती राहणार नाही.

२) म्हणजे जगांत जो मृत्यु यांना आला होता, त्या मृत्युनंतर त्यांना मृत्यूची गोडी चाखावी लागणार नाही. जसे हदीसमध्ये

येते की, मृत्युला एका मेंढ्याच्या स्वरुपांत आणून, नरकाग्नी आणि स्वर्गाच्या दर्म्यान जबाह करून टाकण्यात येईल. आणि घोषणा करून देण्यांत येईल. हे स्वर्गवाश्यांनो! तुमच्याकरीता स्वर्गाचे जीवन नित्याचे आहे. आता तुमच्या करीता मृत्यु नाही. आणि हे नर्कवासियांनो! तुमच्याकरीता नर्काची शिक्षा नित्याची आहे. मृत्यु नाही. (स.बुखारी, स.मुस्लिम) दुसऱ्या हदीसमध्ये फर्माविले, हे स्वर्गवाश्यांनो! तुमच्या दैवी आतां आरोग्य आणि सामर्थ्य आहे. तुम्ही कधी आजारी पडणार नाही. तुमच्यासाठी आता जीवनच जीवन आहे. मृत्यू नाही. तुमच्यासाठी देणग्यांच देणग्या आहेत. यांच्यात कमी होणार नाही. आणि नेहमी तरूण राहाल. कधी म्हातारपण येणार नाही.'' (स.बुखारी व स. मुस्लिम)

३) ज्या प्रमाणे हदीसमध्ये सुद्धाआहे, फर्माविले, ''ही गोष्ट जाणून घ्या! तुमच्यातून कोण्या मनुष्याला, त्याचे कर्म स्वर्गात घेऊन जाणार नाही. सहाबांनी अर्ज केला, हे रसूलुल्लाह ! आपल्याला सुद्धा? फर्माविले, ''होय! मला सुद्धा. परंतु हे की अल्लाहतआला मला आपल्या दयेत आणि कृपेत झांकून घेईल.'' (स.बुखारी,स.मुस्लिम)

४) तूअल्लाहच्या शिक्षेची वाट पहा! जर हे ईमान आणणार नाहीत. हे वाट पहात आहेत, या गोष्टीची की, इस्लामला वर्चस्व आणि चोहोबाजुला पसरण्यापूर्वीच, कदाचित आपला मृत्यू होऊन जाईल.

५) आकाश आणि पृथ्वी मानवांची निर्मिती, जनावरांचे निर्माण करणे, रांत्र दिवसाच्या येण्या जाण्यांत, आणि आकाशातील पावसाच्या मार्फत, मृत जमिनीत, जीवनाची लहर उसळणे, वगैरे. आसमंतात आणि तुमच्या जीवांत, असंख्य निशाण्या आहेत, ज्या अल्लाहच्या एक होण्यावर, आणि त्याच्या पालकत्वावर प्रमाण आहेत.

६) म्हणजे कधी वाऱ्याचे वहाणे, उत्तरेकडून दक्षिणेला, तर कधी पूर्वेकडून पश्चिमेला असते. कधी जमिनीला ओली करणारे वारे, तर कधी जमिनीला कोरडी करणारे वारे, कधी रात्रीला तर कधी दिवसाला, काही वारे पाऊस आणणारे काही परिणामी लाटा उसळविणारे, काही वारे मनाला आनंदीत करणारे, तर काही सर्वांना होरपळून देणारे आणि निव्वळ धुळीचे वादळ. वाऱ्यांचे एवढे प्रकार सुद्धा प्रमाणित करतात की, या ब्रम्हांडाचा कोणी चालविणारा आहे. आणि तो एकच आहे. दोन किंवा दोनपेक्षा जास्त नाही. सर्व अधिकारांचा स्वामी तोच एक आहे. याच्यांत कोणी याचा सरकतदार नाही. सर्व आणि प्रत्येक प्रकारचा फेरबदल फक्त तोच करतो. कोण्या दुसऱ्याजवळ मामुलीसा फेरबदल करण्याचा पण अधिकार नाही. याच भावार्थाचे महावाक्य सू.बकर:चे महावाक्य क्र.१६४ पण आहे.

७) म्हणजे अल्लाहचे अवतरीत केलेले कुरआन, ज्यांत त्याच्या एकेश्वरवादाचे पुरावे आणि प्रमाणे आहेत. जर हे यावर सुद्धा ईमान आणत नाहीत, तर अल्लाहच्या गोष्टीनंतर कोणाची गोष्ट आहे. आणि याच्या निशाण्यांनंतर कोणाच्या निशाण्या आहेत, ज्यावर हे ईमान आणतील ?

८) अफ्फाक, कज्जाब च्या अर्थांत, असीम, फार गुन्हेगार, 'वय्ल' गारद होण्याच्या अर्थांत, किंवा नरकाग्नीच्या एका दरीचे नाव.

९) म्हणजे कुफ्रवर अडून राहतो. आणि सत्याच्या मुकाबल्यांत आपल्याला मोठा समजतो. आणि गर्वांत, गोष्ट ऐकून सुद्धा टाळतो.

१०) म्हणजे पहिल्याने तो कुरआनाला लक्षपूर्वक ऐकतच नाही. आणि जर कोणी गोष्ट त्याच्या कानावर पडते, किंवा कोणी गोष्ट त्याच्या लक्षात येते, तर तिची टिंगल आणि हंशी उडवितो. आपल्या कोत्या बुद्धीने आणि कोत्या समजुतीने, किंवा कुफ्रवर व गुन्ह्यावर अडून राहण्यामुळे.

११) म्हणजे अशा कर्तृत्वाच्या लोकांसाठी कयामतमध्ये नरकाग्नी आहे.

१२) म्हणजे जगांत जी धनसंपत्ती त्यांनी कमविली असेल, ज्या संतती आणि जथ्यावर ते गर्व करीत राहिले असतील ते कयामतच्या दिवशी त्यांना काही फायदा पोहचवूशकणार नाहीत.

१३) ज्यांना जगांत आपले मित्र, मददगार आणि उपास्य बनवून ठेवले होते, ते त्या दिवशी त्यांच्या दृष्टीस पडणार नाही, मदत ते काय करतील ?

१४) म्हणजे कुरआन, कारण की याच्या प्रकटीकरणाचा उद्देश्यच हा आहे की, लोकांना कुफ्र आणि शिर्कच्या अंध:कारांतून काढून, ईमानाच्या प्रकाशांत आणले जावे. म्हणून याच्या संपूर्ण हिदायत घेण्यांत काही संशय नाही. परंतु हिदायत तर त्यालाच मिळेल, जो याच्यासाठी आपले अंत:करण खुले करील.

هٰذَا هُدًى ۚ وَالَّذِيْنَ كَفَرُوْا بِاٰيٰتِ رَبِّهِمْ لَهُمْ عَذَابٌ مِّنْ رِّجْزٍ اَلِيْمٌ ﴿۱۱﴾

ही तर (पूर्ण) हिदायत आहे. (१) आणि ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याच्या निशाण्यास मानले नाही, त्यांच्याकरीता फार मोठ्या यातनेची दु:खदायक शिक्षाआहे. ११

اَللّٰهُ الَّذِيْ سَخَّرَ لَكُمُ الْبَحْرَ لِتَجْرِيَ الْفُلْكُ فِيْهِ بِاَمْرِهٖ وَلِتَبْتَغُوْا مِنْ فَضْلِهٖ وَلَعَلَّكُمْ تَشْكُرُوْنَ ﴿۱۲﴾

अल्लाहच आहे ज्याने तुमच्याकरीता समुद्राला (२) आज्ञांकीत करून दिले कारण की त्याच्या हुकूमाने त्यांच्यात गलबते चालावित; (३) आणि तुम्ही त्याच्या औदार्याचा (४) शोध घ्यावा; आणि जे की तुम्ही त्याचे आभार मानावेत. (५) १२

وَسَخَّرَ لَكُمْ مَّا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ جَمِيْعًا مِّنْهُ ۚ اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَاٰيٰتٍ لِّقَوْمٍ يَّتَفَكَّرُوْنَ ﴿۱۳﴾

आणि आकाश आणि पृथ्वीच्या प्रत्येक वस्तुला सुद्धा, त्याने आपल्याकडून तुमच्याकरीताआज्ञांकीत करून दिले आहे. (६) जे मनन करतील तर खचित्‌च याच्यांत पुष्कळशा निशाण्या पावतील. १३

قُلْ لِّلَّذِيْنَ اٰمَنُوْا يَغْفِرُوْا لِلَّذِيْنَ لَا يَرْجُوْنَ اَيَّامَ اللّٰهِ لِيَجْزِيَ قَوْمًا بِمَا كَانُوْا يَكْسِبُوْنَ ﴿۱۴﴾

आपण ईमानवाल्यांना सांगून टाका की, त्यांनी या लोकांना क्षमा करावी, जे अल्लाहच्या दिवसाची विश्वास बाळगत नाहीत; (७) कारण की, अल्लाहतआलाने अशा लोकांना त्यांच्या कर्तृत्वाचा मोबदला द्यावा. (८) १४

مَنْ عَمِلَ صَالِحًا فَلِنَفْسِهٖ ۚ وَمَنْ اَسَآءَ فَعَلَيْهَا ؗ ثُمَّ اِلٰى رَبِّكُمْ تُرْجَعُوْنَ ﴿۱۵﴾

जो पुण्य करेल तो आपल्या वैयक्तिक भल्याकरीता, आणि जो पाप करेल त्याचे ओझे त्याच्यावरच आहे. (९) मग तुम्ही सर्व आपल्या पालनकर्त्याकडे (१०) परतवून नेले जाल. १५

१) अलीमुन अजाबुन चे वैशिष्ट्य आहे, काही याला 'रिजजुन' चे वैशिष्ट्य सांगतात. 'रिजजून' अर्थ सक्त शिक्षा.

२) म्हणजे याला असे बनवून टाकले की, तुम्ही गलबते आणि जहाजांच्या मार्फत, त्यावर प्रवास करूंशकावा.

३) म्हणजे समुद्रांत गलबते आणि जहाजांचे चालणे, ही तुमची कमाल आणि कला नाही, हा अल्लाहचा हुकूम आणि त्याची मर्जी आहे. नाही तर, जर तो इच्छिता, तर समुद्रांच्या लाटांना एवढा शिरजोर करून देता, की कोणी गलबत किंवा जहाज, त्यांच्यासमोर टिकूच शकले नसते. जसे की कधी कधी तो आपल्या सामर्थ्याच्या प्रदर्शनासाठी असे करतो. जर नेहमी करता, लाटांच्या शिरजोरीची हीच स्थिती राहती, तर तुम्ही कधीही समुद्रांत प्रवास करण्याच्या योग्य राहिले नसते.

४) म्हणजे व्यापाराच्या मार्फत, आणि याच्यांत सूर मारून, मोत्ये, आणि दुसऱ्या वस्तूं काढून, आणि सामुद्रिक प्राणी (मासे वगैरे) यांची शिकार करून.

५) हे सर्व काही यासाठी केले की, तुम्ही या देणग्यांवर अल्लाहचे आभार मानावेत, ज्या तुम्हाला समुद्र प्रवासामुळे प्राप्त होतात.

६) आज्ञांकीत करण्याचा अर्थ हाच आहे की त्यांना तुमच्या सेवेत लाऊन दिले आहे. तुमच्या गरजा आणि फायदे, तुमची रोजी रोटी, यांच्याशीच संबंधित आहेत. जसे चंद्र, सूर्य, प्रकाशित तारे, पाऊस, ढग आणि वारे वगैरे आहेत. आणि आपल्याकडूनच अर्थ, आपली दया आणि खास औदार्याने.

७) म्हणजे जे या गोष्टीची भीती बाळगत नाहीत की अल्लाहतआला आपल्या ईमानदार सेवकांची मदत करण्याला आणि शत्रुंना नष्ट करण्याचे सामर्थ्य बाळगतो. याच्याने अभिप्रेत काफिर आहेत. आणि अल्लाहच्या दिवसाने अभिप्रेत घडामोडी आहेत. जसे, ''व जक्किर हुम्‌ बिअय्यामिल्लाह.'' (सू.इब्राहीम-५) मध्ये आहे. अर्थ आहे की, त्या काफिरांशी 'नजरअंदाज करा जे अल्लाहची शिक्षा आणि त्याच्या पकडीपासून निर्भय आहेत. हा सुरवातीचा हुकूम होता. जो मुसलमानांना प्रथम दिला जात होता. नंतर जेव्हा मुसलमान सामना करण्यास योग्य होऊन गेलेत. तेव्हा मग सक्तीचा आणि त्यांच्याशी टक्कर घेण्याचा हुकूम देऊन देण्यात आला.

८) म्हणजे जेव्हा तुम्ही यांच्या त्रास देण्यावर सहनशिलता पत्कराल आणि त्याच्या अत्याचारांकडे दुर्लक्ष कराल, तर हे सर्व गुन्हे त्यांच्या जबाबदारीवरच राहतील. ज्यांची शिक्षा आम्ही त्यांना कयामतच्या दिवशी देऊं.

९) म्हणजे प्रत्येक समूह, आणि प्रत्येक व्यक्तीचे कर्म, चांगले किंवा वाईट, त्याचा फायदा किंवा नुकसान, स्वत: करणाऱ्यालाच मिळेल, दुसऱ्या कोणाला नाही. याच्यांत पुण्य करण्याला प्रोत्साहनपण आहे. आणि पापकर्माला मनाईपण.

१०) मग तो प्रत्येकाला त्याच्या कर्माप्रमाणे मोबदला देईल. सदाचरणी लोकांना चांगला आणि दुराचरणींना वाईट.

وَلَقَدْ اٰتَيْنَا بَنِيْٓ اِسْرَاۗءِيْلَ الْكِتٰبَ وَالْحُكْمَ وَالنُّبُوَّةَ وَرَزَقْنٰهُمْ مِّنَ الطَّيِّبٰتِ وَفَضَّلْنٰهُمْ عَلَي الْعٰلَمِيْنَ ۝١٦

**खचित्च आम्ही बनी इस्राईलला पुस्तक, अधिकार, [१] आणि पैगंबरी दिली होती. आणि आम्ही त्यांना स्वच्छ (आणि उमदा) अन्नसंपत्ती दिली होती. [२] आणि त्यांना सकल जगाच्या लोकांवर श्रेष्ठत्व दिले होते. [३] ⑯**

وَاٰتَيْنٰهُمْ بَيِّنٰتٍ مِّنَ الْاَمْرِ ۚ فَمَا اخْتَلَفُوْٓا اِلَّا مِنْۢ بَعْدِ مَا جَاۗءَهُمُ الْعِلْمُ ۙ بَغْيًۢا بَيْنَهُمْ ۭ اِنَّ رَبَّكَ يَقْضِيْ بَيْنَهُمْ يَوْمَ الْقِيٰمَةِ فِيْمَا كَانُوْا فِيْهِ يَخْتَلِفُوْنَ ۝١٧

**आणि आम्ही त्यांना धर्माची स्पष्ट स्पष्ट प्रमाणे दिली [४] (होती.) मग त्यांनी अपाल्याजवळ ज्ञान पोहचून गेल्यानंतर, आपसातील हट्ट धर्मीनेच मतभेद करून टाकला. [५] हे ज्या ज्या गोष्टीत मतभेद करीत आहेत, त्यांचा निर्णय कयामतच्या दिवशी (स्वत:) त्यांच्या दर्म्यान अल्लाहतआला करील. [६] ⑰**

ثُمَّ جَعَلْنٰكَ عَلٰي شَرِيْعَةٍ مِّنَ الْاَمْرِ فَاتَّبِعْهَا وَلَا تَتَّبِعْ اَهْوَاۗءَ الَّذِيْنَ لَا يَعْلَمُوْنَ ۝١٨

**मग आम्ही तुम्हांस धर्माच्या राजमार्गावर लावून दिले आहे. [७] तर आपण त्याच्यावरच लागून रहा. आणि नादानांच्या मनेच्छेच्या अनुकरणांत पडू नका. [८] ⑱**

اِنَّهُمْ لَنْ يُّغْنُوْا عَنْكَ مِنَ اللّٰهِ شَـيْــــًٔا ۭ وَاِنَّ الظّٰلِمِيْنَ بَعْضُهُمْ اَوْلِيَاۗءُ بَعْضٍ ۚ وَاللّٰهُ وَلِيُّ الْمُتَّقِيْنَ ۝١٩

**(लक्षांत ठेवा !) हे लोक अल्लाहच्या कोण्या शिक्षेला, आपल्यावरून हटवूशकत नाहीत. (समजून घ्या की,) जालीम लोक आपसांत एक दुसऱ्याचे मित्र असतात. आणि अल्लाहला भिऊन वागणाऱ्यांचा मित्र अल्लाहतआला आहे. ⑲**

هٰذَا بَصَاۗىِٕرُ لِلنَّاسِ وَهُدًى وَّرَحْمَةٌ لِّقَوْمٍ يُّوْقِنُوْنَ ۝٢٠

**हे (कुरआन) लोकांसाठी बसीरत [९] (प्रमाण), आणि हिदायत व दया आहे; त्या [१०] लोकांसाठी जे विश्वास बाळगतात. ⑳**

१) पुस्तकाने अभिप्रेत तौरात, हुकूमाने अधिकार, आणि राज्य किंवा निर्णयाची ती क्षमता आहे जी वादविवादाच्या काळांत, आणि लोकांच्या दर्म्यान फैसले करण्यास आवश्यक आहे.

२) त्या अन्नसंपत्ती ज्या यांच्याकरीता विहीत होत्या. आणि यांतच मन्न आणि सल्वाचे अवतरण होते.

३) म्हणजे त्यांच्या काळाच्या अनुषंगाने.

४) की हे हलाल आहे आणि हे हराम, किंवा चमत्कार अभिप्रेत आहेत. म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या पैगंबरीचे ज्ञान, आपल्या पैगंबरीचे पुरावे, आपल्या हिजरत स्थानाची निश्चिती, अभिप्रेत आहे.

५) बगयम् बैनहुम्चा अर्थ आहे, आपसांत एक दुसऱ्याशी, मत्सर, द्वेष आणि दुराग्रह जाहीर करत, किंवा मर्तबा आणि पदाकरीता, त्यांनी आपल्या धर्मांत, ज्ञान येऊन पोहचल्यावर सुद्धा, मतभेद किंवा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या पैगंबरीचा इन्कार केला.

६) म्हणजे सत्यावर असणाऱ्यांना चांगला मोबदला आणि मिथ्यावादींना वाईट मोबदला देईल.

७) शरीअतचा शब्द कोशीय अर्थ आहे रस्ता, धर्म आणि प्रशस्त मार्ग. मुख्य मार्गाला पण शारेअ म्हटले जाते. की तो उद्देश्य आणि ध्येयाप्रत पोहचवितो. तर शरीअतने अभिप्रेत येथे तो धर्म आहे, जो अल्लाहने आपल्या सेवकांसाठी निश्चित केला आहे. कारण की लोकांनी याच्यावर चालून, अल्लाहच्या प्रसन्नतेचा उद्देश्य प्राप्त करून घ्यावा. महावाक्याचा अर्थ आहे, आम्ही आपणांस धर्माचा एक स्पष्ट मार्ग किंवा पद्धतीवर कायम करून दिले आहे, जी आपल्याला सत्यापर्यंत पोहचवून देईल.

८) जे अल्लाहचा एकेश्वरवाद आणि त्याच्या धर्माकडून अजाण आहेत. अभिप्रेत मक्केचे काफिर आणि त्यांचे साथीदार आहेत.

९) म्हणजे त्या प्रमाणांचा संग्रह आहे, जे धर्माच्या आदेशांशी संबंधित आहेत. आणि ज्यांच्याशी मानवी आवश्यकता आणि इच्छा संगल्न आहेत.

१०) म्हणजे जगांत हिदायतचा मार्ग दाखविणारा आहे. आणि परलोकांत अल्लाहच्या दयेला कारणीभूत आहे.

أَمْ حَسِبَ الَّذِينَ اجْتَرَحُوا السَّيِّئَاتِ أَن نَّجْعَلَهُمْ كَالَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ سَوَاءً مَّحْيَاهُمْ وَمَمَاتُهُمْ ۚ سَاءَ مَا يَحْكُمُونَ ﴿٢١﴾

काय त्या लोकांची, जे वाईट कामे करतात, ही कल्पना आहे की, आम्ही त्यांना त्या लोकांसारखे करून टाकू, ज्यांनी ईमान आणले आणि चांगली कामे केलीत. त्या सर्वांचे जिणे मरणे सारखे होऊन जाईल?[१] वाईट निर्णय हे लोक करीत आहेत. (२१)

وَخَلَقَ اللَّهُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضَ بِالْحَقِّ وَلِتُجْزَىٰ كُلُّ نَفْسٍ بِمَا كَسَبَتْ وَهُمْ لَا يُظْلَمُونَ ﴿٢٢﴾

आणि आकाश आणि पृथ्वीला अल्लाहने फारच न्यायाने निर्माण केले आहे. आणि यासाठी की, प्रत्येक मनुष्याला त्याच्या केलेल्या कामाचा पूर्ण मोबदला दिला जावा. आणि त्यांच्यावर जुलूम केला जाणार नाही.[२] (२२)

أَفَرَأَيْتَ مَنِ اتَّخَذَ إِلَٰهَهُ هَوَاهُ وَأَضَلَّهُ اللَّهُ عَلَىٰ عِلْمٍ وَخَتَمَ عَلَىٰ سَمْعِهِ وَقَلْبِهِ وَجَعَلَ عَلَىٰ بَصَرِهِ غِشَاوَةً فَمَن يَهْدِيهِ مِن بَعْدِ اللَّهِ ۚ أَفَلَا تَذَكَّرُونَ ﴿٢٣﴾

काय आपण त्याला पण पाहिले ? ज्याने आपल्या मनेच्छेला आपला उपास्य बनवून ठेवले[३] आहे. आणि समजून उमजून सुद्धा, अल्लाहने त्याला बहकवून टाकले आहे.[४] आणि त्याच्या कान आणि अंत:करणावर मोहोर लावून टाकली[५] आहे. आणि त्याच्या डोळ्यांवर सुद्धा पडदा टाकून दिला आहे.[६] आता अशा माणसाला अल्लाहच्या नंतर कोण हिदायत देऊ शकतो?[७] काय आता सुद्धा तुम्ही बोध घेत नाही?[८] (२३)

وَقَالُوا مَا هِيَ إِلَّا حَيَاتُنَا الدُّنْيَا نَمُوتُ وَنَحْيَا وَمَا يُهْلِكُنَا إِلَّا الدَّهْرُ ۚ وَمَا لَهُم بِذَٰلِكَ مِنْ عِلْمٍ ۖ إِنْ هُمْ إِلَّا يَظُنُّونَ ﴿٢٤﴾

त्यांनी म्हटले की, आमचे जीवन तर हेच ऐहिक जीवन आहे. आम्ही मरतो आणि जगतो. आणि आम्हाला फक्त काळच मारून टाकतो.[९] वास्तविक याची यांना काही खबरच नाही. हे तर निव्वळ कल्पना आणि अटकळीवर चालत आहेत. (२४)

وَإِذَا تُتْلَىٰ عَلَيْهِمْ آيَاتُنَا بَيِّنَاتٍ مَّا كَانَ حُجَّتَهُمْ إِلَّا أَن قَالُوا ائْتُوا بِآبَائِنَا إِن كُنتُمْ صَادِقِينَ ﴿٢٥﴾

आणि जेव्हा यांच्यासमोर आमच्या स्पष्ट आणि प्रकाशमान महावाक्यांचे पठण केले जाते, तर यांच्याजवळ या म्हणण्याशिवाय काही प्रमाण नव्हते की, जर तुम्ही खरे आहांत तर आमच्या वाडवडीलांना आणून हजर करा.[१०] (२५)

قُلِ اللَّهُ يُحْيِيكُمْ ثُمَّ يُمِيتُكُمْ ثُمَّ يَجْمَعُكُمْ إِلَىٰ يَوْمِ الْقِيَامَةِ لَا رَيْبَ فِيهِ وَلَٰكِنَّ أَكْثَرَ النَّاسِ لَا يَعْلَمُونَ ﴿٢٦﴾

आपण सांगून टाका की, अल्लाहच तुम्हास जिवंत करतो; मग तुम्हास मारून टाकतो. मग तुम्हास कयामतच्या दिवशी एकत्र गोळा करील. ज्याच्यात काही शंका नाही. परंतु बहुतेक लोक समजत नाहीत. (२६)

وَلِلَّهِ مُلْكُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ ۚ وَيَوْمَ تَقُومُ السَّاعَةُ يَوْمَئِذٍ يَخْسَرُ الْمُبْطِلُونَ ﴿٢٧﴾

आणि आकाश आणि पृथ्वीचे राज्य अल्लाहचेच आहे, आणि ज्या दिवशी कयामत कायम होईल, त्या दिवशी मिथ्यावादी लोक मोठ्या तोट्यात पडतील. (२७)

وَتَرَىٰ كُلَّ أُمَّةٍ جَاثِيَةً ۚ كُلُّ أُمَّةٍ تُدْعَىٰ إِلَىٰ كِتَابِهَا الْيَوْمَ تُجْزَوْنَ مَا كُنتُمْ تَعْمَلُونَ ﴿٢٨﴾

आणि आपण पाहाल की, प्रत्येक समूह गुडघे टेकून बसलेले[११] असतील. प्रत्येक पंथ आपल्या कर्मपत्राकडे बोलाविला जाईल. आज तुम्हांस आपल्या केलेल्या कर्माचा बदला दिला जाईल. (२८)

१) म्हणजे इहलोक आणि परलोकात उभयतांच्या दर्म्यान काही फरक करणार नाही. अशाप्रकारे मुळीच होऊ शकत नाही. किंवा अर्थ आहे की, ज्याप्रमाणे इहलोकांत ते समान होते, परलोकांत पण ते समानच राहतील की, मरून हे सुद्धा नष्ट आणि ते सुद्धा नष्ट? न कुकृत्ये करणारांस शिक्षा, न ईमान आणि चांगली कामे करण्यांस इनाम. असे होणार नाही. म्हणूनच पुढे सांगितले, यांचा हा फैसला वाईट आहे, जो हे करीत आहेत.

२) आणि हा न्याय हाच आहे की, कयामतच्या दिवशी निष्पक्षपाती निर्णय होईल. आणि प्रत्येक मनुष्याला त्याच्या

कर्माप्रमाणे चांगला किंवा वाईट मोबदला दिला जाईल. असे होणार नाही की पुण्यवान आणि पापी या उभंयताबरोबर तो सारखीच वर्तणूक करेल. जशी की, काफिरांची निरर्थक कल्पना आहे. ज्याचे खंडन मागील महावाक्यांत केले गेले आहे. कारण की दोघांना समान पातळीवर ठेवणे जुलूम म्हणजे न्यायाच्या विरुद्ध पण आहे. म्हणून ज्याप्रमाणे काटे पेरून, द्राक्षांचे पीक प्राप्त केले जाऊ शकत नाही; अशाच प्रकारे पाप कर्मे करून, ते स्थान प्राप्त होऊ शकत नाही, जे अल्लाहने ईमानवाल्यांसाठी राखून ठेवले आहे.

२) मग तो यालाच चांगले समजतो, ज्याला त्याची मनेच्छा चांगला आणि त्यालाच वाईट समजतो, ज्याला त्याची मनेच्छा वाईट ठरवते. म्हणजे अल्लाह आणि पैगंबराच्या आदेशांच्या मुकाबल्यांत, आपल्या मनेच्छेला प्राधान्य देतो. किंवा आपल्या बुद्धीला महत्त्व देतो. वास्तविक बुद्धी सुद्धा वातावरणाने प्रभावित, किंवा फायद्यामुळे परिणाम घेणारी होऊन, मनेच्छेप्रमाणे चुकीचा निर्णय घेऊ शकते. एक अर्थ याचा हा केला गेला आहे, जो अल्लाहकडून अवतरीत झालेली हिदायत आणि प्रमाणे, यांच्याशिवाय आपल्या मर्जीच्या धर्माचा अंगीकार करतो. आणि काही म्हणतात की, याच्याने असा मनुष्य अभिप्रेत आहे जो दगडाला पुजत होता. जेव्हां त्याला जास्त सुंदर दगड भेटून जाई, तेव्हां पहिल्या दगडाला फेंकून दुसऱ्याला उपास्य बनवून घेत असे. (फत्हुल कदीर)

३) म्हणजे ज्ञान प्राप्त झाल्यावर आणि तर्क कायम झाल्यावर सुद्धा, तो बहकण्याचा मार्ग अनुसरतो. जसे पुष्कळशे आपल्या विद्वान होण्याच्या घमेंडीत राहणाऱ्या मार्गभ्रष्ट ज्ञानी लोकांची स्थिती आहे. ते मार्गभ्रष्ट होतात, त्यांचा मुख्य उद्देश निराधार असतो. परंतु आमच्यापेक्षा शहाणा कोणीच नाही च्या घमेंडीमध्ये ते आपल्या प्रमाणांना असे समजतात जणुआकाशांतून तारे तोडून आणले आहेत. आणि अशा प्रकारे ज्ञान आणि समज असून सुद्धा, ते मार्गभ्रष्ट होतात आणि इतरांना सुद्धा मार्गभ्रष्ट करतात.

४) ज्यामुळे त्याचे कान हितोपदेश ऐकण्यापासून, आणि त्याचे अंत:करणे हिदायत समजण्यापासून वंचित् होऊन गेलेत.

५) म्हणून तो सत्याला पाहूपण शकत नाही.

६) जसे फर्माविले, ''ज्याला अल्लाहतआला मार्गभ्रष्ट करून टाकेल, त्याला कोणी मार्गावर आणूंशकत नाही. आणि अल्लाहतआला त्यांना त्यांच्या मार्गभ्रष्टतेत, भटकत सोडून देतो.'' (सू.आअ्राफ-१८६)

७) म्हणजे चिंतन मनन करीत नाहीत की वास्तविक स्थिती तुमच्यावर स्पष्ट आणि जाहीर होऊन जावी.

८) हे नास्तिक आणि त्यांचे साथी, मक्केचे मुशरिक लोकांचे म्हणणे आहे. जे परलोकाला नाकारणारे होते. ते म्हणत असत की, बस! हे जगातील जीवनच हे पहिले आणि शेवटचे जीवन आहे; याच्यानंतर कोणी जीवन नाही. आणि याच्यात जीवन मृत्युचा क्रम निव्वळ कालचक्राचा परिणाम आहे. जसे तत्त्वज्ञानींचा एक समूह म्हणतो की, प्रत्येक छत्तीस हजार वर्षांनंतर प्रत्येक वस्तू दुसऱ्यांदा आपल्या मूळ स्थितीवर परतून येते. आणि हा क्रम कोण्या निर्माता आणि व्यवस्थापकाशिवाय असा स्वत:च चालत राहिला आहे. आणि चालत राहील; न त्याचा काही प्रारंभ आहे न काही शेवट. हा समूह 'दौरिया' कालचक्राचा मानणारा म्हणविला जातो. (इब्ने कसीर) हदीसे कुदसी आहे, अल्लाहतआला फर्माविते, '''आदमचा पुत्र मला इजा पोहचविती. काळाला बरे वाईट म्हणतो. (म्हणजे याच्याकडे कामांना संबंधित करून, त्याला वाईट म्हणतो) वास्तविक (काळ स्वत: काही वस्तू नाही.) मी स्वत: काळ आहे. माझ्याच हातात, सर्व सत्ता आहे. रात्र आणि दिवस मीच फिरविती.'' (अल्बुखारी,स.मुस्लीम)

९) हे त्यांचे सर्वात मोठे प्रमाण आहे. जे यांच्या निरर्थक वादविवादांचे दर्शक आहे.

१०) उघड महावाक्याने असेच वाटते की, प्रत्येक समूहच (मग जरी तो पैगंबरांचा मानणारा असो किंवा त्यांचा विरोधक) भय आणि दहशतीमुळे, गुडघे टेकून बसलेला असेल. (फत्हुल कदीर) येथ पावेतो की सर्वांना हिशेबासाठी बोलाविले जाईल. जसे की महावाक्याच्या पुढील भागाने स्पष्ट होते.

هٰذَا كِتٰبُنَا يَنْطِقُ عَلَيْكُمْ بِالْحَقِّ ۚ اِنَّا
كُنَّا نَسْتَنْسِخُ مَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ﴿٢٩﴾

हे आहे आमचे पुस्तक जे तुमच्या बाबतीत खरे खरे बोलत आहे.[१] आम्ही तुमची कर्मे लिहवून घेत होतो.[२] (२९)

فَاَمَّا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ فَيُدْخِلُهُمْ
رَبُّهُمْ فِيْ رَحْمَتِهٖ ۚ ذٰلِكَ هُوَ الْفَوْزُ الْمُبِيْنُ ﴿٣٠﴾

परंतु ज्या लोकांनी ईमान आणले आणि त्यांनी चांगली[३] कामे केली. तर त्यांना त्यांचा पालनकर्ता आपल्या दयेखाली घेऊन[४] घेईल. हीच उघड सफलता आहे. (३०)

وَاَمَّا الَّذِيْنَ كَفَرُوْا ۗ اَفَلَمْ تَكُنْ اٰيٰتِيْ تُتْلٰى
عَلَيْكُمْ فَاسْتَكْبَرْتُمْ وَكُنْتُمْ قَوْمًا مُّجْرِمِيْنَ ﴿٣١﴾

परंतु ज्या लोकांनी कुफ्र केले तर (मी त्यांना सांगेन) काय माझी महावाक्ये तुम्हास ऐकविली जात नव्हती?[५] तरी सुद्धा तुम्ही गर्व करीत राहिला. आणि तुम्ही होताच गुन्हेगार लोक[६] (३१)

وَاِذَا قِيْلَ اِنَّ وَعْدَ اللّٰهِ حَقٌّ وَّالسَّاعَةُ
لَا رَيْبَ فِيْهَا قُلْتُمْ مَّا نَدْرِيْ مَا السَّاعَةُ ۙ
اِنْ نَّظُنُّ اِلَّا ظَنًّا وَّمَا نَحْنُ بِمُسْتَيْقِنِيْنَ ﴿٣٢﴾

आणि जेव्हांकधी सांगितले जाईल की अल्लाहचे वचन खचित्च खरे आहे. आणि कयामतच्या येण्यांत काही शंका नाही, तेव्हा तुम्ही उत्तर देत असत की, आम्ही जाणत नाही कयामत काय वस्तूआहे ? आमची काही अशीच कल्पना होऊन जाते, पण आम्हाला खात्री नाही[७] (३२)

وَبَدَا لَهُمْ سَيِّاٰتُ مَا عَمِلُوْا وَحَاقَ بِهِمْ مَّا
كَانُوْا بِهٖ يَسْتَهْزِءُوْنَ ﴿٣٣﴾

आणि त्यांच्यावर आपल्या कर्मांचा वाईटपणा उघड होऊन गेला. आणि ज्याची ते थट्टा उडवीत होते, त्याने त्यांना घेरून टाकले.[८] (३३)

وَقِيْلَ الْيَوْمَ نَنْسٰىكُمْ كَمَا نَسِيْتُمْ لِقَآءَ يَوْمِكُمْ
هٰذَا وَمَاْوٰىكُمُ النَّارُ وَمَا لَكُمْ مِّنْ نّٰصِرِيْنَ ﴿٣٤﴾

आणि सांगून टाकण्यात येईल की, आज आम्ही तुम्हांस विसरुन जाऊ; जसे तुम्ही आपल्या या दिवसाच्या भेटीला विसरुन[९] गेला होता. तुमचे ठिकाण नरकाग्नी आहे. आणि तुमचा कोणी मददगार नाही. (३४)

ذٰلِكُمْ بِاَنَّكُمُ اتَّخَذْتُمْ اٰيٰتِ اللّٰهِ هُزُوًا وَّغَرَّتْكُمُ
الْحَيٰوةُ الدُّنْيَا ۚ فَالْيَوْمَ لَا يُخْرَجُوْنَ مِنْهَا وَلَا
هُمْ يُسْتَعْتَبُوْنَ ﴿٣٥﴾

हे अशासाठी आहे की, तुम्ही अल्लाहतआलाच्या महावाक्यांची हंशी उडविली होती. आणि ऐहिक जीवनाने तुम्हांस धोक्यांत टाकून ठेवले होते. तर आजच्या दिवशी, न तर हे (नरकाग्नीतून) काढले जातील न तर त्यांचा बहाणा मानला जाईल.[१०] (३५)

فَلِلّٰهِ الْحَمْدُ رَبِّ السَّمٰوٰتِ وَرَبِّ الْاَرْضِ رَبِّ
الْعٰلَمِيْنَ ﴿٣٦﴾

तर अल्लाहसाठीच सर्व स्तुती आहे, जो आकाश आणि पृथ्वी आणि सकल जगाचा पालनकर्ता आहे. (३६)

وَلَهُ الْكِبْرِيَآءُ فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۪ وَهُوَ
الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٣٧﴾ ع

४ ११ २० आकाश आणि पृथ्वीत त्याच्याचकरीता गौरव आणि महानता आहे.[११] आणि तोच सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. (३७)

१) या पुस्तकाने अभिप्रेत ते रजिस्टर आहे, ज्याच्यात मनुष्याची सर्व कर्मे नमुद केलेली असतील. ''कर्मपत्रे समोर आणली जातील. पैगंबराना आणि हुतात्मयांना, साक्षीसाठी साद्दर केले जाईल.'' (सू.जुमर - ६९) ही कर्मपत्रे मानवी जीवनासाठी संपूर्ण रेकार्ड असतील की ज्यात काही कमी जास्त असणार नाही. मनुष्य त्यांना पाहून बोलून उठेल, ''हे कसे कर्मपत्र आहे, ज्याने लहान मोठी गोष्ट, कोणालाही सोडले नाही. सर्वच काही तर याच्यांत नमुद्द आहे.'' (सू.कहफ-४९)

२) म्हणजे आमच्या ज्ञानाशिवाय, देवदूतसुद्धा आमच्या हुकूमाने तुमची प्रत्येक गोष्ट नोंद्द करीत होते आणि सुरक्षित ठेवीत होते.

३) येथे सुद्धा ईमानाबरोबर चांगल्या कर्मांचा उल्लेख करून, त्याचे महत्त्व स्पष्ट करून दिले. आणि चांगली कर्मे, भलाईची ती कामे आहेत, जी सुन्नतप्रमाणे अदा केली जातील. न की प्रत्येक ते कर्म ज्याला मनुष्य आपल्याकडून चांगले समजेल. आणि त्याला फारच व्यवस्थित आणि मोठ्या आवडीने करेल. जशा बऱ्याचशा बिद्दअती, धार्मिक

गटांत चालूआहेत. आणि त्या या गटांमध्ये, फर्ज आणि वाजीबपेक्षा जास्त महत्त्वाची समजली जातात. म्हणूनच फर्ज आणि सुन्नतचे तर्क करणे, तर त्यांच्याजवळ सर्व साधारण आहे. परंतु बिदअतींची अशी अंमलबजावणी आहे की यांच्यात कोणत्याही प्रकारच्या कोताईची कल्पना देखील नाही. वास्तविक नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी बिदअतींना 'शर्रुल उमूर' (अत्यंत वाईट काम) ठरविले आहे.

४) रहमत ने अभिप्रेत स्वर्ग आहे. म्हणजे स्वर्गांत दाखल करील. जसे हदीस मध्ये आहे, अल्लाहतआला स्वर्गाला फर्माविल, ''तू माझी रहमत आहे. तुझ्या मार्फत (म्हणजे तुझ्यांत दाखल करून) मी ज्यावर इच्छील, (त्यावर) दया करील.'' (स.बुखारी तफसीर सू.काफ)

५) कान उघाडणी म्हणून त्यांना सांगण्यांत येईल. कारण की, पैगंबर त्यांच्याजवळ आले होते. त्यांनी अल्लाहचे आदेश त्यांना ऐकविले होते. परंतु त्यांनी पर्वा केली नव्हती.

६) म्हणजे सत्याला मान्य करण्यापासून तुम्ही गर्व केला होता आणि ईमान आणले नाही. किंबहुना तुम्ही होतेच गुन्हेगार!

७) म्हणजे कयामत घडून येणे, निव्वळ गुमान आणि अंदाज आहे. आम्हाला तर खात्री नाही की ती घडून येईल.

८) म्हणजे कयामतची शिक्षा, जिला ते थट्टा आणि अनहोनी समजत होते, यांत ते पकडले जातील.

९) जसे हदीसमध्ये येते, अल्लाह आपल्या काही सेवकांना म्हणेल, ''काय मी तुला पत्नी दिली नव्हती? काय मी तुझा मान सन्मान केला नव्हता? काय मी घोडे आणि बैल तुझ्या आधिन करून दिले नव्हते? तू सरदारीपण करत होता आणि कर पण वसूल करीत होतांस. तो म्हणेल होय! हे तर बरोबर आहे, हे माझ्या पालनकर्त्या! अल्लाहतआला त्याला विचारील ''काय तुला माझ्या भेटीची खात्री होती?'' तो म्हणेल नाही! अल्लाहतआला फर्माविल, ''तर आज मी सुद्धां(तुला नरकाग्नीत टाकून) विसरून जाईल; जसा तू मला विसरुन राहिलास'' (स.मुस्लीम)

१०) म्हणजे अल्लाहची महावाक्ये आणि आदेशांचा उपहास आणि इहलोकाच्या फसगतीत आणि गर्वात व्यस्त राहणे, हे दोन अपराध असे आहेत, ज्यांनी तुम्हाला नरकाग्नीच्या शिक्षेला पात्र ठरवून टाकले. आता त्याच्यातून न निघण्याची शक्यता आहे, न या गोष्टींचीच आशा की कधी काळी तुम्हास तौबा करण्याची आणि अल्लाहकडे वळण्याची संधी दिली जाईल. आणि तुम्ही तौबा करून आणि माफी मागून अल्लाहला राजी करून घ्याल.

११) जसे हदीस कुदसीमध्ये अल्लाह फर्मावितो, ''अजमत माझी विजार आहे आणि किब्रियाई माझी चादर आहे. तर जो कोणी याच्यातून कोण्या एकाला पण माझ्याकडून हिसकून घेईल तर मी त्यास नरकाग्नीत टाकून देईन. (स.मुस्लिम)

آياتها ٣٥ (٤٦) سُوْرَةُ الْأَحْقَافِ مَكِّيَّةٌ (٦٦) ركوعاتها ٤

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

महावाक्ये ३५

# (४६)सू. अल-अहकाफ

रुकूअ ४

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

حٰمٓ ①

**हा मीम[१] (१)**

تَنْزِيْلُ الْكِتٰبِ مِنَ اللّٰهِ الْعَزِيْزِ الْحَكِيْمِ ②

**या पुस्तकाचे अवतीर्ण होणे समर्थ आणि बुद्धीमान अल्लाहतआलाकडून आहे. (२)**

مَا خَلَقْنَا السَّمٰوٰتِ وَ الْاَرْضَ وَمَا بَيْنَهُمَاۤ اِلَّا بِالْحَقِّ وَ اَجَلٍ مُّسَمًّى ؕ وَ الَّذِيْنَ كَفَرُوْا عَمَّاۤ اُنْذِرُوْا مُعْرِضُوْنَ ③

**आम्ही आकाश आणि पृथ्वी आणि या उभयतांच्या दर्म्यानच्या सर्व वस्तुंना, उत्कृष्ट प्रयोजनासह एका नियमित काळासाठीच निर्माण केले आहे.[२] आणि काफिर लोकांना ज्या गोष्टींपासून भिवविले जात आहे, त्यापासून ते तोंड फिरवून घेतात[३] (३)**

قُلْ اَرَءَيْتُمْ مَّا تَدْعُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ اَرُوْنِيْ مَاذَا خَلَقُوْا مِنَ الْاَرْضِ اَمْ لَهُمْ شِرْكٌ فِي السَّمٰوٰتِ ؕ اِيْتُوْنِيْ بِكِتٰبٍ مِّنْ قَبْلِ هٰذَاۤ اَوْ اَثٰرَةٍ مِّنْ عِلْمٍ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ④

**आपण सांगून द्या जरा पहा तर खरे! ज्यांना तुम्ही अल्लाहच्या शिवाय बोलावित असतात, मला दाखवा की त्यांनी पृथ्वीचा कोणता भाग बनविला आहे किंवा आकाशांमध्ये यांचा कोणता वाटा[४] आहे? जर तुम्ही खरे आहांत तर याच्या पूर्वीचे कोणी पुस्तक किंवा ज्ञानोक्त कथन माझ्या जवळ घेऊन या[५] (४)**

وَمَنْ اَضَلُّ مِمَّنْ يَّدْعُوْا مِنْ دُوْنِ اللّٰهِ مَنْ لَّا يَسْتَجِيْبُ لَهٗۤ اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ وَ هُمْ عَنْ دُعَآئِهِمْ غٰفِلُوْنَ ⑤

**आणि याच्यापेक्षांही जास्त बहकलेला आणखी कोण असेल? जो अल्लाहशिवाय अशांना बोलावितो, जे कयामतपर्यंत त्याची प्रार्थना मान्य करू शकत नाही. किंबहुना त्यांच्या बोलाविण्याकडून सुद्धा बेखबर आहेत[६] (५)**

१) हा या अध्यायाचा प्रारंभ त्या सांकेतिक शब्दांमधून आहे, ज्याचे ज्ञान फक्त अल्लाहतआलालाच आहे. म्हणून याच्या अर्थ आणि भावार्थांत पडण्याची आवश्यकता नाही. तथापि याचे दोन फायदे काही भाष्यकारांनी सांगितले आहे. जसे सू.लुकमान आ.१ मध्ये वर्णन केलेले आहे.

२) म्हणजे आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीचा एक खास उद्देश्य पण आहे; आणि तो आहे मनुष्यांची कसोटी. दुसरे याच्यासाठी एक वेळ पण निश्चित आहे. जेव्हा ती वायदा केलेली वेळ येऊन जाईल, तेव्हा आकाश आणि पृथ्वीची सध्या अस्तित्वात असलेली व्यवस्था उद्धवस्त होऊन जाईल. न आकाश हे आकाश असेल, न पृथ्वी ही पृथ्वी असेल. ''ज्या दिवशी पृथ्वी, या पृथ्वीच्या शिवाय आणखी काही बदलून टाकली जाईल, आणि आकाशसुद्धा.'' (सू.इब्राहीम - ४८)

३) म्हणजे ईमान न आणण्याच्या स्वरूपांत, पुन्हा जिवंत होऊन उठणे, हिशोब, आणि कर्मांचा मोबदला, यापासून त्यांना जे भिवविण्यांत येते; ते याची पर्वा करीत नाही. याच्यावर ईमान आणत नाही; आणि परलोकातील शिक्षेपासून वांचण्याची तयारी करीत नाहीत.

४) 'अरअय्तुम' 'अख्बिरूनी' च्या अर्थांत किंवा 'अरूनी' म्हणजे अल्लाहला सोडून, ज्या मूर्तींची किंवा व्यक्तींची तुम्ही उपासना करीत आहांत, मला सांगा किंवा दाखवा की त्यांनी पृथ्वी आणि आकाशाच्या निर्मितीत कोणता वांटा घेतला आहे? अर्थ हा आहे की, जेव्हांआकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीत त्यांचा काही वाटा नाही, किंबहुना संपूर्ण रीत्या या सर्वांचा निर्माता फक्त एक अल्लाह आहे, तर मग तुम्ही या खोट्या उपास्यांना, अल्लाहच्या उपासनेत कांशामील करतात?

५) म्हणजे कोण्या पैगंबरावर अवतरीत झालेल्या पुस्तकामध्ये किंवा कोण्या सनदशीर उल्लेखांत, ही गोष्ट लिहली असेल तर आणून दाखवा की तुमचे सत्यत्व स्पष्ट होऊं शकावे. काहींनी 'असा रतिम् मिन् इल्मिन' चा अर्थ स्पष्ट ज्ञानोक्त प्रमाणाचा केला आहे. या स्वरुपांत पुस्तकाने नोंदविलेले प्रमाण आणि 'असारतिम् मिन् इल्मिन' ने बौद्धीक प्रमाण, अभिप्रेत होतील. म्हणजे कोणी बौद्धीक किंवा नोंदविलेले प्रमाण सादर करा. पहिला अर्थ याच्या परिणामापासून निघण्याच्या आधारावर, रिवायतचा केला गेला आहे. किंवा 'बक़ीयतम् मन् इल्मिन' पहिल्या पैगंबरांच्या बाकी राहिलेल्या शिकवणींचा हिस्सा, जो भरोसा पात्र सुत्रांमार्फत नोंद करत आला आहे, यांत ही गोष्ट असावी.

६) म्हणजे हेच सर्वांत मोठे बहकलेले आहेत. जे दगडांच्या मूर्तींना किंवा मरण पावलेल्या व्यक्तींना मदतीसाठी पुकारतात. जे कयामतपर्यंत उत्तर देण्यात असमर्थ आहेत. आणि असमर्थच नाही तर बिल्कुल बेखबर आहेत.

وَإِذَا حُشِرَ النَّاسُ كَانُوا لَهُمْ أَعْدَآءً وَّكَانُوا بِعِبَادَتِهِمْ كٰفِرِيْنَ ۝٦

**आणि लोकांना जेव्हा एकत्र गोळा केले जाईल, तर हे त्यांचे शत्रू होऊन जातील. आणि त्यांच्या उपासनेला स्पष्ट नाकारुन टाकतील[१] ६**

وَإِذَا تُتْلٰى عَلَيْهِمْ اٰيٰتُنَا بَيِّنٰتٍ قَالَ الَّذِيْنَ كَفَرُوْا لِلْحَقِّ لَمَّا جَآءَهُمْ ۙ هٰذَا سِحْرٌ مُّبِيْنٌ ۝٧

**आणि जेव्हा त्यांना आमची स्पष्ट महावाक्ये वांचून ऐकविली जातात, तेव्हा नाकारणारे लोक सत्य गोष्टीला, जेव्हा की ती यांच्याजवळ येऊन चुकली, सांगून टाकतात की, ही तर धडधडीत जादू आहे. ७**

أَمْ يَقُوْلُوْنَ افْتَرٰىهُ ۖ قُلْ إِنِ افْتَرَيْتُهٗ فَلَا تَمْلِكُوْنَ لِيْ مِنَ اللّٰهِ شَيْـًٔا ۖ هُوَ أَعْلَمُ بِمَا تُفِيْضُوْنَ فِيْهِ ۖ كَفٰى بِهٖ شَهِيْدًا ۢ بَيْنِيْ وَبَيْنَكُمْ ۖ وَهُوَ الْغَفُوْرُ الرَّحِيْمُ ۝٨

**किंबहुना सांगून टाकतात की याला तर याने स्वत: रचले आहे.[२] आपण सांगून द्या की, जर मी याला बनवून आणले आहे, तर तुम्ही माझ्या करिता अल्लाहकडून, कोण्या गोष्टीचा अधिकार बाळगत नाहीत;[३] तुम्ही या (कुरआनाच्या) बाबतीत, जे काही म्हणत ऐकत आहांत, त्याला अल्लाह खूप (चांगल्याप्रकारे) जाणतो.[४] माझ्या आणि तुमच्या दर्म्यान सत्याला जाहीर करणारा तोच पुरेसा[५] आहे. आणि तो क्षमाकर्ता आणि दयाळू[६] आहे. ८**

१) हा विषय कुरआन करीममध्ये अनेक ठिकाणी वर्णन केला गेला आहे. उदाहरणार्थ सू.यूनुस-२१, सू.मर्यम - ८१, ८२, सू.अन्कबूत-२५ वगैरे महावाक्ये. या जगांत या उपास्यांचे दोन प्रकार आहेत. एक तर दगड किंवा वृक्ष आणि अल्लाहच्या सामर्थ्याच्या निशाण्या (सूर्य, आग वगैरे) आहेत. अल्लाहतआला त्यांना जीवन आणि बोलण्याची शक्ती बहाल करेल. आणि या वस्तू बोलून दाखवतील की आम्हास मुळीच या गोष्टीचे ज्ञान नाही की हे आमची उपासना करीत होते. आणि आम्हास तुझ्या ईश्वरतत्वांत शामील करीत होते. उपास्यांचा दुसरा प्रकार तो आहे, जो पैगंबर, देवदूत आणि सदाचरणी लोकांमधून आहेत. जसे ह.ईसा عليه السلام; ह. उजैर عليه السلام आणि दुसरे अल्लाहचे सदाचरणी सेवक आहेत. हे अल्लाहच्या दरबारामध्ये अशाच प्रकारे उत्तर देतील, जसे ह.ईसा عليه السلام चे उत्तर कुरआन करीममध्ये नोंदविलेले आहे. याशिवाय शैतान पण इन्कार करतील. जसे कुरआनांत यांचे म्हणणे नोंदविले आहे. ''आम्ही तुझ्या समोर (आपल्या भक्तांकडून) अलिप्त असल्याचे जाहीर करतो. हे आमची उपासना करीत नव्हते.'' (सू.कसस-६३)

२) या सत्याने अभिप्रेत जे त्यांच्याजवळ आलेले कुरआन करीम आहे. त्याचा चमत्कार आणि परिणाम करण्याच्या शक्तीला पाहून ते याला जादूने संबोधित करीत. मग याला वगळून किंवा यामुळे पण गोष्ट जमत नसल्याने म्हणत की ही तर, मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ची स्वत: रचलेली वाणी आहे.

३) म्हणजे जर तुमची ही गोष्ट खरी असेल की मी अल्लाहचा बनविलेला पैगंबर नाही, आणि ही वाणी पण माझी आपली रचलेली आहे, तर खचित्‌च मी मोठा अपराधी आहे. अल्लाहतआला तर एवढ्या मोठ्या खोट्यावर मला पकडल्याशिवाय सोडणार नाही. आणि जर अशी काही पकड झाली तर मग समजून घ्यावे की, मी लबाड आहे आणि माझी काही मदत पण करू नये. किंबहुना अशा स्थितीत मला अल्लाहच्या पकडीपासून वांचविण्याचा तुम्हास काही अधिकारपण राहणार नाही. याच विषयाला दुसऱ्या ठिकाणी अशाप्रकारे वर्णन करण्यांत आले आहे; ''आणि जर हा आमच्यावर कोणतीही गोष्ट बनवून घेता; तर अलबत् आम्ही त्याचा उजवा हात धरून घेतो. मग त्याच्या हृदयाची शीर कापून टाकतो. मग तुमच्यातून कोणी सुद्धा यापासून अडविणारा झाला नसता.'' (सू.हाक्का-४४-४७)

४) म्हणजे ज्या ज्या पद्धतीने तुम्ही कुरआनाला खोटे ठरवीत आहांत; कधी त्याला जादू, कधी अदृष्टाच्या गोष्टी सांगणारे (ज्योतिष्य), कधी रचलेले म्हणतात. अल्लाह त्याला खूप चांगल्याप्रकारे जाणतो. म्हणजे तोच तुमच्या या निंदनीय हरकतींचा पुरेपूर बदला देईल.

५) तो या गोष्टीच्या साक्षीला पुरेसा आहे की, हे कुरआन त्याच्याकडून अवतरीत झालेले आहे. आणि तोच तुमच्या खोटे ठरवण्याला आणि विरोधाला पण साक्षी आहे. याच्यांत पण त्याच्यासाठी सक्त धमकी आहे.

६) यासाठी जो तौबा करून घेईल, ईमान आणील, आणि कुरआनाला अल्लाहची खरी वाणी मानून घेईल. अर्थ हा आहे की, आतासुद्धा वेळ आहे तर तौबा करून, अल्लाहच्या क्षमा आणि दयेला पात्र ठरून जा.

قُلْ مَا كُنتُ بِدْعًا مِّنَ الرُّسُلِ وَمَآ أَدْرِي مَا
يُفْعَلُ بِي وَلَا بِكُمْ ۖ إِنْ أَتَّبِعُ إِلَّا مَا يُوحَىٰٓ
إِلَيَّ وَمَآ أَنَا۠ إِلَّا نَذِيرٌ مُّبِينٌ ⑨

**आपण सांगून द्या की, मी कोणी बिल्कुल नवा पैगंबर तर नाही.** [१] **न मला हे ठाऊक आहे की, माझ्या बरोबर आणि तुमच्या बरोबर काय केले जाईल.** [२] **मी तर फक्त त्याचे अनुकरण करतो जे माझ्याकडे वह्य पाठविले जाते. आणि मी तर फक्त जाहीरपणे, सावध करून देणारा आहे.** ⑨

قُلْ أَرَءَيْتُمْ إِن كَانَ مِنْ عِندِ ٱللَّهِ وَكَفَرْتُم بِهِۦ
وَشَهِدَ شَاهِدٌ مِّنۢ بَنِىٓ إِسْرَٰٓءِيلَ عَلَىٰ مِثْلِهِۦ
فَـَٔامَنَ وَٱسْتَكْبَرْتُمْ ۖ إِنَّ ٱللَّهَ لَا يَهْدِى ٱلْقَوْمَ
ٱلظَّٰلِمِينَ ⑩

**आपण सांगून द्या जर हे (कुरआन) अल्लाहकडूनच असेल आणि तुम्ही त्याला मानले नसेल, आणि बनी इस्राईलच्या एका साक्षीदाराने या सारखी साक्ष पण देऊन चुकला असेल, आणि त्याने ईमान पण आणून चुकला असेल, आणि तुम्ही शिरजोरी केली असेल** [३] **तर निःसंशय अल्लाहतआला आज्ञाभंजक समूहाला (सन्) मार्ग दाखवित नसतो** ⑩

وَقَالَ ٱلَّذِينَ كَفَرُوا۟ لِلَّذِينَ ءَامَنُوا۟ لَوْ كَانَ خَيْرًا مَّا
سَبَقُونَآ إِلَيْهِ ۚ وَإِذْ لَمْ يَهْتَدُوا۟ بِهِۦ فَسَيَقُولُونَ
هَٰذَآ إِفْكٌ قَدِيمٌ ⑪

**आणि काफिरांनी ईमानवाल्यांच्या संबंधात सांगितले की जर हा (धर्म) उत्तम असता, तर हे लोक याच्याकडे आमच्याआधी सरसाऊन गेले नसते. आणि कारण की यांना या कुरआनाकडून हिदायत मिळाली नाही, तेव्हा हे म्हणतील की (हे तर) पुरातन थोतांड आहे.** [४] ⑪

१) म्हणजे पहिला आणि अनोळखी पैगंबर तर मी नाही. किंबहुना माझ्यापूर्वी सुद्धा अनेक पैगंबर येऊन चुकले आहेत.

२) म्हणजे जगांत. मी मक्केतच राहील किंवा येथून निघून जाण्याला मला भाग पाडले जाईल. मला स्वाभाविक मृत्यू येईल, किंवा तुमच्या हातून माझा खून होईल? तुम्ही लवकरच शिक्षेत ग्रस्त व्हाल किंवा, दीर्घ अवकाश तुम्हास दिला जाईल? या सर्व गोष्टीचे ज्ञान फक्त अल्लाहलाच आहे. मला ठाऊक नाही की, माझ्याबरोबर किंवा तुमच्याबरोबर उद्या काय होईल? तथापि परलोकाच्या बाबतीत निश्चित ज्ञान आहे की, ईमानवाले स्वर्गांत आणि काफिर नरकाग्नीत जातील. आणि हदीसमध्ये जे येते की, नबी ﷺ नी काही सहाबांच्या मृत्युवर जेव्हा त्यांच्या बाबतीत चांगले गुमान केले गेले, तेव्हा फर्माविले, ''अल्लाह ची शपथ ! मला अल्लाहचा पैगंबर होण्यावर सुद्धा, ठाऊक नाही की, कयामतच्या दिवशी माझ्या आणि तुमच्याबरोबर काय केले जाईल?'' (स.बुखारी) याच्याने कोण्या एका निश्चित व्यक्तीच्या निव्वळ परिणामाच्या ज्ञानाचे खंडन आहे. याशिवाय हे की त्यांच्या बाबतीत सुद्धां 'नस्स' (स्पष्ट हुकूम) उपस्थित असावा. जसे अशरए मुबश्शेरा (ते दहा सहाबी ज्यांना इहलोकातच स्वर्गाची खुषखबर देण्यात आली) आणि बद्रचे सहाबी वगैरे.

३) या बनी इस्राईलच्या साक्षीदाराने कोण अभिप्रेत आहे? बनी इस्राईलमधून प्रत्येक ईमान आणणारा याला पात्र आहे. काही म्हणतात की मक्केत राहणारा कोणी बनी इस्राईल अभिप्रेत आहे. कारण की हा अध्याय मक्की आहे. काहींच्या जवळ याच्याने अभिप्रेत अब्दुल्लाह् बिन सलाम ﷺ आहेत. आणि ते या महावाक्याला मदनी ठरवितात. सही हैनच्या रिवायतीने सुद्धा, याचे समर्थन होते. (स.बुखारी,स.मुस्लिम) म्हणूनच इमाम शौकानीने या मताला प्राधान्य दिले आहे. अला मिसलेहि (याच सारख्या पुस्तकाची साक्ष) चा अर्थ आहे तौरात ची साक्ष. जे कुरआनाच्या अल्लाहकडून अवतीर्ण होण्यावर ठाम आहे. कारण की कुरआन सुद्धा एकेश्वरवाद आणि परलोकाच्या सिद्ध करण्यांत, तौरात सारखेच आहे. अर्थ हा आहे की, ग्रंथधारीची साक्ष आणि त्यांच्या ईमान आणल्यानंतर, याच्या अल्लाहकडून अवतरीत होण्यांत काही शंका राहून जात नाही. म्हणून याच्या नंतर तुमच्या नकार आणि अहंकाराला काही अर्थ नाही. तुम्हांस आपल्या या चालीच्या परिणामाचा विचार करावयास पाहिजे.

४) मक्केचे काफिर, हजरत बिलाल, अम्मार, सुहेब आणि खब्बाल (रजी अल्लाहतआला अन्हुम) सारख्या मुसलमानांना जे गरीब आणि कंगाल प्रकारचे लोक होते; परंतु इस्लाम कबूल करण्यांत त्यांना अग्रेसर होण्याचा मान प्राप्त झाला. त्यांना पाहून म्हणत की जर या धर्मांत उत्तमता असती तर आमच्या सारखे उच्च आणि प्रतिष्ठीत मर्तब्यावाले लोक सर्वात प्रथम त्याला कबूल करते, न की हे लोक पहिले ईमान आणते. म्हणजे आपल्याकडून त्यांनी आपल्या बाबतीत हे ठरवून घेतले की, अल्लाहच्या जवळ त्यांचे मोठे स्थान आहे. म्हणून जर हा धर्म पण अल्लाहकडून असता तर अल्लाहतआला आम्हांस याच्या मान्य करण्यांत मागे न सोडता; आणि जेव्हांआम्ही त्याला अंगिकारले नाही, तर त्याचा अर्थ हा आहे की, हे एक पुरातन थोतांड आहे. म्हणजे कुरआनाला त्यांनी पुरातन थोतांड ठरविले. जसे ते त्याला असातिरुल अव्वलीन पण म्हणत होते. वास्तविक ऐहिक धनसंपत्तीत संपन्न होणे, अल्लाहजवळ मान्यतेचे प्रमाण नसते. (जशी त्यांची गैरसमजूत झाली किंवा शैतानाने त्यांना गैर समजुतीत टाकले.) अल्लाहजवळ तर मान्यतेसाठी ईमान आणि निखालसतेची आवश्यकता आहे. आणि ईमान आणि इखलासच्या दौलतीने तो ज्याला इच्छितो, उपकृत करतो. जशी तो धन आणि संपत्ती कसोटी घेण्यासाठी म्हणून, ज्याला इच्छितो त्याला देतो.

وَمِنْ قَبْلِهٖ كِتٰبُ مُوْسٰٓى اِمَامًا وَّرَحْمَةً ؕ وَهٰذَا كِتٰبٌ مُّصَدِّقٌ لِّسَانًا عَرَبِيًّا لِّيُنْذِرَ الَّذِيْنَ ظَلَمُوْا ۖ وَبُشْرٰى لِلْمُحْسِنِيْنَ ﴿١٢﴾

आणि याच्यापूर्वी मूसाचे पुस्तक मार्गदर्शन आणि दया होती. आणि हे पुस्तक आहे (त्याला) खरे ठरवणारे अरबी भाषेत कारण की शिरजोरांना भिववावे आणि सुकृत्ये करणारांस शुभवर्तमान द्यावे (१२)

اِنَّ الَّذِيْنَ قَالُوْا رَبُّنَا اللّٰهُ ثُمَّ اسْتَقَامُوْا فَلَا خَوْفٌ عَلَيْهِمْ وَلَا هُمْ يَحْزَنُوْنَ ﴿١٣﴾

नि:संशय ज्या लोकांनी सांगितले की आमचा पालनकर्ता अल्लाह आहे. मग याच्यावर (दृढ) जमून राहिले, तर त्यांना काही भय राहणार नाही; आणि ते दु:खी (पण) होणार नाहीत. (१३)

اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ الْجَنَّةِ خٰلِدِيْنَ فِيْهَا ۚ جَزَآءًۢ بِمَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿١٤﴾

हे तर स्वर्गवाले आहेत, जे नेहमी त्यांच्यातच राहतील. त्या कर्मांच्या बदल्यांत जे ते करीत होते. (१४)

وَوَصَّيْنَا الْاِنْسَانَ بِوَالِدَيْهِ اِحْسٰنًا ؕ حَمَلَتْهُ اُمُّهٗ كُرْهًا وَّوَضَعَتْهُ كُرْهًا ؕ وَحَمْلُهٗ وَفِصٰلُهٗ ثَلٰثُوْنَ شَهْرًا ؕ حَتّٰٓى اِذَا بَلَغَ اَشُدَّهٗ وَبَلَغَ اَرْبَعِيْنَ سَنَةً ۙ قَالَ رَبِّ اَوْزِعْنِيْٓ اَنْ اَشْكُرَ نِعْمَتَكَ الَّتِيْٓ اَنْعَمْتَ عَلَيَّ وَعَلٰى وَالِدَيَّ وَاَنْ اَعْمَلَ صَالِحًا تَرْضٰىهُ وَاَصْلِحْ لِيْ فِيْ ذُرِّيَّتِيْ ۚ اِنِّيْ تُبْتُ اِلَيْكَ وَاِنِّيْ مِنَ الْمُسْلِمِيْنَ ﴿١٥﴾

आणि आम्ही मनुष्याला आपल्या आईबापांबरोबर चांगली वागणूक करण्याचा हुकूम दिला आहे. त्याच्या आईने त्याला त्रास सहन करून पोटांत ठेवले. आणि त्रास सहन करून त्याला जन्म दिला. [१] त्याच्या गर्भाचा आणि त्याच्या दूध सोडविण्याचा काळ तीस महिन्याचा आहे. [२] येथपावेतो की, तो जेव्हाआपल्या कमाल सामर्थ्याच्या काळाला आणि चाळीस वर्षाच्या वयाला पोहचला, [३] तेव्हा म्हणू लागला हे माझ्या पालनकर्त्या! मला सुबुद्धी दे की मी [४] तुझ्या या देणगीचे आभार मानावेत, जी तू माझ्यावर आणि माझ्या आईबापांवर बक्षिस केली आहेस. आणि हे की मी अशी चांगली कामे करावीत ज्याने तू खूष होऊन जावास. आणि तू माझ्या संततीला सुद्धा सदाचरणी बनीव. मी तुझ्याकडे वळतो आणि मी मुसलमानांमधून आहे. (१५)

اُولٰٓئِكَ الَّذِيْنَ نَتَقَبَّلُ عَنْهُمْ اَحْسَنَ مَا عَمِلُوْا وَنَتَجَاوَزُ عَنْ سَيِّاٰتِهِمْ فِيْٓ اَصْحٰبِ الْجَنَّةِ ؕ وَعْدَ الصِّدْقِ الَّذِيْ كَانُوْا يُوْعَدُوْنَ ﴿١٦﴾

हेच ते लोक आहेत ज्यांची चांगली कामे तर आम्ही मान्य करून घेतो. आणि यांच्या पापांची गय करून टाकतो . (हे) स्वर्गीय लोकांमधून आहेत. त्या खऱ्या वायद्याप्रमाणे, जो यांच्याशी केला जात होता. (१६)

१) या श्रम आणि त्रासांचा उल्लेख, आईबापांबरोबर चांगल्या वागणुकीच्या हुकूमांत आणखी ताकीद करता आहे. ज्याने हे पण ठाऊक होते की, आई या चांगल्या वागणुकीच्या हुकुमांत बापांपेक्षा, अग्रेसर आहे. कारण की, नऊ महिन्यांपर्यंत सतत गर्भाचा त्रास आणि मग प्रसुतीचा त्रास, फक्त आईच सहन करते. अशाच प्रकारे दूध पाजण्याचा त्रास पण एकटी आईच उचलते. बापाची याच्यांत भागीदारी नाही. म्हणून हदीसमध्ये सुद्धा, आईबरोबर चांगल्या वर्तणुकीला प्राथमिकता दिली गेली आहे. आणि बापाचा दर्जा याच्या नंतर दाखविण्यांत आला आहे. एका सहाबी رضي الله عنه नी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला विचारले माझ्या चांगल्या वागणुकीला सर्वांत जास्त हक्कदार कोण आहे? आपण फर्माविले, तुमची आई त्याने मग पुन्हा हेच विचारले, आपण पुन्हा हेच उत्तर दिले. तिसऱ्या वेळेस पण हेच उत्तर दिले. चवथ्यांदा विचारल्यावर, आपण फर्माविले, मग तुमचा बाप (स.मुस्लिम)

२) 'फिसाल' चा अर्थ दूध सोडविणे आहे. याच्याने काही सहाबांनी ग्राह्य धरले आहे की, गर्भाची मुद्दत कमीत कमी सहा महिने आहे. यासाठी की, कुरआनाने दूध पाजण्याची मुदत, दोन वर्षे (२४ महिने) दाखविली आहे. (सू.लुकमान-१४, सू.बकर: - २३३) या हिशेबाने गर्भारपणाची मुद्दत फक्त सहा महिनेच बाकी राहून जाते.

३) कमाले कुदरत काळ (अशुद्दहू) ने अभिप्रेत तारुण्य आहे, काहींनी याला १८ वर्षे धरले आहे. येथपावेतो की मग वाढत वाढत चाळीस वर्षाच्या वयाला पोहचून गेला. हे वय बुद्धीच्या परिपूर्णतेचे, संपूर्ण भरतारुण्याचे वय आहे. म्हणूनच भाष्यकारांचे मत आहे की, प्रत्येक पैगंबराला चाळीस वर्षांनंतर पैगंबरी बहाल करण्यांत आली. (फत्हुल कदीर)

४) मला सुबुद्धी दे! याच्याने आधार घेत धर्मपंडितांनी म्हटले आहे की, या वयानंतर मनुष्याने ही दुआ भरपूर म्हणत राहिले पाहिजे. म्हणजे 'रब्बी अव्जिअनी' पासून 'मिनल मुस्लिमीन' पर्यंत.

وَالَّذِیْ قَالَ لِوَالِدَیْهِ اُفٍّ لَّكُمَاۤ اَتَعِدٰنِنِیْۤ اَنْ اُخْرَجَ
وَقَدْ خَلَتِ الْقُرُوْنُ مِنْ قَبْلِیْ ۚ وَهُمَا یَسْتَغِیْثٰنِ
اللّٰهَ وَیْلَكَ اٰمِنْ ۖۗ اِنَّ وَعْدَ اللّٰهِ حَقٌّ ۚۖ فَیَقُوْلُ
مَا هٰذَاۤ اِلَّاۤ اَسَاطِیْرُ الْاَوَّلِیْنَ ﴿١٧﴾

**आणि ज्याने आपल्या आईबापाला म्हटले की, मी तुम्हाला कंटाळून गेलो. तुम्ही मला [१] हेच सांगत राहाल की मी मेल्यानंतर पुन्हा जिवंत केला जाईल. माझ्यापूर्वी सुद्धा कित्येक काळ जाऊन चुकला आहे. [२] ते दोघे अल्लाहजवळ काकुळती करतात आणि (मुलाला) म्हणतात की, तुझा सत्त्यानाश होवो! तू ईमानवाला होऊन जा. नि:संशय अल्लाहचा वायदा खरा आहे. तो उत्तर देतो की या तर फक्त पूर्वीच्या लोकांच्या भाकडकथा आहेत. [३] (१७)**

اُولٰٓىِٕكَ الَّذِیْنَ حَقَّ عَلَیْهِمُ الْقَوْلُ فِیْۤ اُمَمٍ قَدْ خَلَتْ
مِنْ قَبْلِهِمْ مِّنَ الْجِنِّ وَالْاِنْسِ ؕ اِنَّهُمْ كَانُوْا
خٰسِرِیْنَ ﴿١٨﴾

**हे ते लोक आहेत, ज्यांच्यावर अल्लाहच्या शिक्षेचा वायदा खरा होऊन गेला. [४] त्या जिन्नात आणि मनुष्यांच्या समूहांच्या बरोबर, जे यांच्यापूर्वी होऊन चुकले आहेत. [५] जे नि:संशय नुकसान उचलणारे होते .(१८)**

وَلِكُلٍّ دَرَجٰتٌ مِّمَّا عَمِلُوْا ۚ وَلِیُوَفِّیَهُمْ اَعْمَالَهُمْ
وَهُمْ لَا یُظْلَمُوْنَ ﴿١٩﴾

**आणि प्रत्येकाला आपआपल्या कर्मानुसार दर्जे मिळतील. [६] कारण की त्यांना आपल्या कर्माचे पूर्ण पूर्ण मोबदले द्यावे. आणि त्यांच्यावर जुलूम केला जाणार नाही. [७] (१९)**

وَیَوْمَ یُعْرَضُ الَّذِیْنَ كَفَرُوْا عَلَی النَّارِ ؕ اَذْهَبْتُمْ
طَیِّبٰتِكُمْ فِیْ حَیَاتِكُمُ الدُّنْیَا وَاسْتَمْتَعْتُمْ بِهَا ۚ فَالْیَوْمَ
تُجْزَوْنَ عَذَابَ الْهُوْنِ بِمَا كُنْتُمْ تَسْتَكْبِرُوْنَ
فِی الْاَرْضِ بِغَیْرِ الْحَقِّ وَبِمَا كُنْتُمْ تَفْسُقُوْنَ ﴿٢٠﴾

**आणि ज्या दिवशी काफिर नरकाग्नीच्या समोर आणले जातील; [८] (सांगण्यांत येईल) तुम्ही आपली पुण्य कर्मे ऐहिक जीवनांतच नष्ट करून टाकली. आणि यापासून फायदा उचलून चुकले. तर आज तुम्हास फजितीच्या यातनांची शिक्षा दिली जाईल; [९] यासाठी की तुम्ही मुलुखांत गर्व करीत होता. आणि यासाठी पण की तुम्ही आज्ञाभंग करीत होता. [१०] (२०)**

وَاذْكُرْ اَخَا عَادٍ ؕ اِذْ اَنْذَرَ قَوْمَهٗ بِالْاَحْقَافِ وَقَدْ خَلَتِ
النُّذُرُ مِنْۢ بَیْنِ یَدَیْهِ وَمِنْ خَلْفِهٖۤ اَلَّا تَعْبُدُوْۤا
اِلَّا اللّٰهَ ؕ اِنِّیْۤ اَخَافُ عَلَیْكُمْ عَذَابَ یَوْمٍ عَظِیْمٍ ﴿٢١﴾

**आणि 'आद' च्या भावाची आठवण करा, जेव्हा की त्याने आपल्या लोकांना 'अहकाफ' मध्ये भिवविले. [११] आणि खचित्‌च याच्या पूर्वी सुद्धा भिवविणारे होऊन चुकले आहे. आणि याच्यानंतर सुद्धा. हे की तुम्ही अल्लाहतआलाच्या शिवाय आणखी कोणाची उपासना करू नका. नि:संशय मला तुमच्या बाबतीत एका मोठ्या दिवसाच्या शिक्षेचे भय वाटते [१२] (२१)**

قَالُوْۤا اَجِئْتَنَا لِتَاْفِكَنَا عَنْ اٰلِهَتِنَا ۚ فَاْتِنَا بِمَا تَعِدُنَاۤ
اِنْ كُنْتَ مِنَ الصّٰدِقِیْنَ ﴿٢٢﴾

**लोकांनी उत्तर दिले, काय तुम्ही आमच्याजवळ यासाठी आला आहात की, आम्हांस आमच्या उपास्यांच्या पुजेपासून फिरवून टाकावे? [१३] जर मग तुम्ही खरे आहांत, तर ज्या शिक्षांचा तुम्ही वायदा करीत आहांत, त्यांना आमच्यावर आणा पाहू! (२२)**

قَالَ اِنَّمَا الْعِلْمُ عِنْدَ اللّٰهِ ۖؗ وَاُبَلِّغُكُمْ مَّاۤ اُرْسِلْتُ بِهٖ
وَلٰكِنِّیْۤ اَرٰىكُمْ قَوْمًا تَجْهَلُوْنَ ﴿٢٣﴾

**(हजरत हूदने) सांगितले (त्याचे) ज्ञान तर अल्लाहजवळच आहे मी तर जो संदेश देऊन पाठविण्यांत आलो होतो, तो तुम्हास पोहचवित आहे. [१४] परंतु मी तुम्हास पहातो की तुम्ही नादानी करीत आहात [१५] (२३)**

१) चर्चित महावाक्यामध्ये, सदाचरणी संततीची चर्चा होती, जी आईबापांबरोबर चांगली वागणूक पण ठेवते आणि याच्या करीतांभलाईची दुआ पण करते. आता याच्या तुलनेत दुराचरणी आणि आज्ञाभंजक संततीचा उल्लेख केला जात आहे. जे आईबापांशी उद्धटपणे वागतात. 'उफ्फिल्लकुमा' खेद आहे, तुमच्यावर. 'उफ्फ' चा शब्द ना खुषीला जाहीर करण्यासाठी उपयोगांत आणला जातो. म्हणजे आज्ञाभंजक संतती, आई बापाच्या उपदेशपर गोष्टीवर किंवा ईमान आणि चांगल्या कामांच्या आवाहनावर नाराजी आणि फारच क्रोधायमान होऊन जाते. ज्याची संततीला मुळीच परवानगी नाही. हे महावाक्य सर्वसाधारण आहे. प्रत्येक आज्ञाभंजक संततीला ते लागू पडते.

२) अर्थ आहे की, ते तर दुसऱ्यांदा जिवंत होऊन जगांत आले नाहीत. वास्तविक दुसऱ्यांदा जिवंत होण्याचा अर्थ,

कयामतच्या दिवशी जिवंत होणे आहे. ज्याच्या नंतर हिशोब होईल.
३) आईबाप मुसलमान असतील, आणि संतती काफिर, तर तेथे संतती आणि आईबापांच्या दर्म्यान, अशाप्रकारे तक्रार आणि वादविवाद होतात. ज्याचा नमुना या महावाक्यांत वर्णन केला आहे.
४) जे पूर्वींच अल्लाहच्या ज्ञानांत होते किंवा शैतानाच्या उत्तरांत अल्लाहने फर्माविले होते, ''की तुझ्याने आणि तुझ्या सर्व मानणाऱ्यांनी, मी सुद्धा नरकाग्नीला भरुन टाकीन.'' (सू.सॉद - ८५)
५) म्हणजे हे सुद्धा त्या काफिरांमध्ये जमा होऊन गेले, जे मनुष्य आणि जिन्नांत मधून, कयामतच्या दिवशी नुकसान उचलणारे असतील.
६) ईमानवाले आणि काफिर, उभयतांचे त्यांच्या कर्मानुसार, अल्लाहजवळ दर्जे होतील. ईमानवाल्यांना उच्च दर्जे प्राप्त होतील; आणि काफिर नरकाग्नीच्या अत्यंत कनिष्ठ दर्जात असतील.
७) गुन्हेगाराला त्याच्या अपराधापेक्षा जास्त शिक्षा दिली जाणार नाही. आणि सदाचरणी लोकांच्या मोबदल्यात कमी केले जाणार नाही. किंबहुना प्रत्येकाला चांगले किंवा वाईट मधून, तेच काही मिळेल ज्याला तो पात्र असेल.
८) म्हणजे त्या वेळेला आठवा, जेव्हा काफिरांच्या डोळ्यांवरून परदे हटवून दिले जातील, आणि ते नरकाग्नीच्या आगीला पाहत असतील किंवा तिच्याजवळ असतील. काहींनी 'युअरजुन' चा अर्थ 'युअज्जबून' चा केला आहे.
९) तय्यबात ने अभिप्रेत त्या देणग्या आहेत, ज्या माणसे आवडीने खातात पितात आणि उपयोगांत आणतात. आणि रुची आणि आनंद त्यांना जाणवतो परंतु परलोकाच्या काळजीसह याचा उपयोग केला जात असेल तर गोष्ट वेगळी आहे, जसे एक ईमानवाला करतो. तो याच्या बरोबर बरोबर अल्लाहच्या आदेशांचे पालन करून, अल्लाहचे आभार पण मानत असतो. परंतु परलोकाच्या काळजीकडून बेफिकरी बरोबर याचा उपयोग, मनुष्याला शिरजोर आणि बंडखोर बनवून देतो. जसे काफिर करतो. आणि अशा प्रकारे तो अल्लाहशी कृतघ्नता करतो. परंतु ईमानवाल्याला तर याच्या आभार आणि आज्ञापालनाने या देणग्या, किंबहुना यांच्यापेक्षा कितीतरी उत्तम देणग्या परलोकांत पुन्हा मिळून जातील. परंतु काफिरांना तेच काही सांगण्यांत येईल जे या महावाक्यांत मजकुर आहे. 'अजहब्तुम तय्यीबाति कुम्' ....... चे दुसरे भाष्यांतर आहे, ''ऐहिक जीवनांत तुम्ही आपली मौज मजा उडवून घेतली आणि खूप फायदा उचलून घेतला.''
१०) यांच्या शिक्षेची दोन कारणे सांगितली. एक अनाठायी गर्व, ज्यामुळे मनुष्य सत्त्याचे अनुपालन करण्यापासून पळ काढतो. आणि दुसरे आज्ञाभंजन, निर्भयतेसह पापाचरण; या दोन्ही गोष्टी तमाम काफिरांमध्ये एकसारख्याच असतात. ईमानवाल्यांना या दोन्ही गोष्टींपासून आपल्याला वांचविले पाहिजे.
<u>विशेष टीप :</u> काही सहाबांच्या बाबतीत येते की, त्यांच्या समोर उत्कृष्ट खाद्यान्न वगैरे येई तर या महावाक्याची त्यांना आठवण येई. आणि ते भयाने याला तर्क करून देत की कोठे परलोकांत आम्हाला सुद्धा हे न सांगून देण्यांत यावे की, तुम्ही आपली मौजमजा जगांत लुटून घेतली. तर ही त्यांची ही स्थिती आहे, जी त्यांच्या सदाचरणाचा परिणाम आणि ईशभयाचा द्योतक आहे. याचा हा अर्थ नाही की, ते या चांगल्या देणग्यांचा उपयोग योग्य समजत नव्हते.
११) अहकाफ 'हिकफून' चे अनेकवचन आहे. म्हणजे रेतीचा उंच लांबलचक उंचवटा. काहींनी याचा अर्थ पर्वत आणि गुहेचा केला आहे. हे ह.हूद عليه السلام लोक, (आदउला-च्या) इलाख्याचे नांव आहे. जे हजरमुत (यमन) च्या जवळ होते. मक्केच्या काफिरांच्या नाकारण्याला लक्षांत घेऊन नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सांत्वनासाठी, मागील पैगंबराच्या घटनांची चर्चा केली जात आहे.
१२) यौमे अजीम ने अभिप्रेत कयामतचा दिवस आहे. ज्याला याच्या भयानकतेमुळे, मोठा दिवस म्हणण्यात आले आहे.
१३) लितआ फिकना, कारण की तू आम्हास आमच्या उपास्यांच्या पुजेपासून फिरवून द्यावे, रोकून द्यावे, दूर करून द्यावे.
१४) म्हणजे शिक्षा केव्हा येईल? किंवा (या) जगांत येणार नाही किंवा परलोकांत तुम्हास शिक्षा दिली जाईल. याचे ज्ञान फक्त अल्लाहला आहे; तोच आपल्या मर्जीप्रमाणे फैसला करीत असतो. माझे काम तर फक्त संदेश पोहचविणे आहे.
१५) की एक तर कुफ्र वर अडून आहांत. दुसरे, माझ्याकडून अशा गोष्टीची मागणी करीत आहात, जी माझ्या अखत्यारांत नाही.

فَلَمَّا رَأَوْهُ عَارِضًا مُّسْتَقْبِلَ أَوْدِيَتِهِمْ قَالُوا هَٰذَا
عَارِضٌ مُّمْطِرُنَا ۚ بَلْ هُوَ مَا اسْتَعْجَلْتُم بِهِ ۖ رِيحٌ فِيهَا
عَذَابٌ أَلِيمٌ ﴿٢٤﴾

**मग जेव्हा त्यांनी शिक्षेला ढगाच्या रुपांत पाहिले, जो यांच्या मैदानांकडे येत होता, तेव्हा म्हणू लागले हा ढग तर आमच्यावर (पाऊस) वर्षविणार [१] आहे. (नाही) परंतु मुळांत हा ढग ती वस्तूंआहे, ज्याची तुम्ही घाई करीत होता. [२] वारा आहे ज्यात यातनादायक शिक्षा आहे. [३] (२४)**

تُدَمِّرُ كُلَّ شَيْءٍ بِأَمْرِ رَبِّهَا فَأَصْبَحُوا لَا يُرَىٰ إِلَّا
مَسَاكِنُهُمْ ۚ كَذَٰلِكَ نَجْزِي الْقَوْمَ الْمُجْرِمِينَ ﴿٢٥﴾

**जो आपल्या पालनकर्त्याच्या हुकुमाने प्रत्येक गोष्टीचा नाश करीत होता. तर ते असे होऊन गेले की त्यांच्या घरांशिवाय आणखी काही दिसत नव्हते. [४] गुन्हेगारांच्या समूहाला आम्ही अशीच शिक्षा देत असतो. (२५)**

وَلَقَدْ مَكَّنَّاهُمْ فِيمَا إِن مَّكَّنَّاكُمْ فِيهِ وَجَعَلْنَا
لَهُمْ سَمْعًا وَأَبْصَارًا وَأَفْئِدَةً فَمَا أَغْنَىٰ عَنْهُمْ
سَمْعُهُمْ وَلَا أَبْصَارُهُمْ وَلَا أَفْئِدَتُهُم مِّن شَيْءٍ
إِذْ كَانُوا يَجْحَدُونَ بِآيَاتِ اللَّهِ وَحَاقَ بِهِم مَّا كَانُوا
بِهِ يَسْتَهْزِئُونَ ﴿٢٦﴾

**आणि खचित्‌च आम्ही (आदच्या लोकांना) ते सामर्थ्य दिले होते, जे तुम्हास तर दिले सुद्धा नाही. आणि आम्ही त्यांना कान, डोळे आणि अंत:करणे सुद्धा देऊन ठेवली होती. परंतु त्यांचे कान, डोळे आणि अंत:करणांनी त्यांना काही फायदा पोहचविला नाही. [५] जेव्हा की ते अल्लाहतआलाच्या निशाण्यांचा इन्कार करू लागले, आणि ज्या गोष्टीचे ते हंशी उडवीत होते, तीच त्यांच्यावर उलटून पडली. [६] (२६)**

१) बऱ्याच काळापासून त्यांच्या येथे पाऊस पडला नव्हता. चाल करून येणारे ढग पाहून आनंदित झाले की, आता पाऊस येईल. ढगाला चढणारा यासाठी म्हटले आहे की, ढग चढत्या आकाशावर प्रकट होतो.

२) हे ह.हूद ﷺ नी त्यांना म्हटले की, हा केवळ ढग नाही, जसे तुम्ही समजत आहात. किंबहुना ही ती शिक्षा आहे, जिला तुम्ही लवकर आणण्याची मागणी करीत होते.

३) म्हणजे तो वारा ज्याच्याने लोक गारद झालेत, या ढगांतूनच उठला आणि निघाला. आणि अल्लाहच्या मर्जीने त्यांना आणि त्यांच्या प्रत्येक वस्तूला बर्बाद करून गेला. म्हणून हदीस मध्ये येते, ह.आयेशा ﷺ नी रसूलुल्लाह ﷺ ला विचारले, ''लोक तर ढग पाहून खूष होतात, की पाऊस पडेल. परंतु आपल्या चेहऱ्यावर तर याच्या उलट भीतीची चिन्हे दिसतात? आपण (ﷺ) नी फर्माविले, आयशा ﷺ! या गोष्टीची काय खात्री आहे की या ढगांत यातना असणार नाही. जेव्हांकी एक समूह वाऱ्याच्या शिक्षेनेच गारद करुन टाकला गेला. या लोकांनी सुद्धा ढगांना पाहून म्हटले होते, हे ढग आहेत, जे आमच्यावर पाऊस पाडतील.'' (स.बुखारी,स.मुस्लिम) एका दुसऱ्या रिवायतीत आहे की जेव्हा सोसाट्याचा वारा चाले तेव्हा आपण (ﷺ) ही दुआ म्हणत ''अल्लाहुमा इन्नी अस्‌अलुका खैराहा व खैरमाफीहा व वखैरा मा उर्‌सिलत्‌ बिही व अअजुबिका मिन्‌ शर्रीहा व शर्रीमा उर्‌सिलत बिही.'' आणि जेव्हा आकाशात ढग काळेभोर होऊन जात, तर आपला (ﷺ) रंग बदलून जात असे. आणि भीतीसारखी आपली अवस्था होऊन जात असे. ज्याने आपण व्याकूळ होऊन जात. कधी बाहेर निघत, कधी घरांत घुसत. कधी पुढे होत, कधी मागे फिरत. मग जेव्हा पाऊस पडून जाई, आपण (ﷺ) समाधानाचा श्वास सोडीत (स.मुस्लिम)

४) म्हणजे घरात राहणारे सर्व गारद होऊन गेले आणि फक्त घरे, बोध घेण्यासाठी म्हणून, बाकी राहिलीत.

५) हे मक्केवाल्यांना, संबोधित करून सांगण्यात येत आहे. की, अरे ! तुम्ही काय वस्तू आहात? तुमच्या पूर्वीचे समूह ज्यांना आम्ही गारद केले, शक्ती आणि सामर्थ्यामध्ये, तुमच्यापेक्षा किती तरी जास्त होते. परंतु जेव्हा त्यांनी अल्लाहने दिलेल्या क्षमता (डोळे,कान आणि अंत:करणे) सत्याला पाहणे, ऐकणे आणि समजण्यासाठी उपयोगांत आणल्या नाहीत, तर सरशेवटी आम्ही त्यांना गारद करून टाकले. आणि या वस्तू त्यांच्या काही कामा येऊ शकल्या नाहीत.

६) म्हणजे ज्या शिक्षेला ते न घडून येणारी समजत होते आणि उपहास म्हणून म्हणत असत की, ''घेऊन ये, आपली शिक्षा!.'' जीपासून तू आम्हास भिववित राहतोस. ती शिक्षा आली आणि तिने त्यांना असे घेरले की, मग तिच्यातून निघूंशकले नाहीत.

وَلَقَدْ أَهْلَكْنَا مَا حَوْلَكُم مِّنَ الْقُرَىٰ وَصَرَّفْنَا
الْآيَاتِ لَعَلَّهُمْ يَرْجِعُونَ ﴿٢٧﴾

आणि खचित्च आम्ही तुमच्या जवळपासच्या वस्त्या नष्ट करून टाकल्या. (१) आणि तऱ्हे तऱ्हेच्या आमच्या निशाण्या, आम्ही वर्णन करून टाकल्या की, त्यांनी माघार घ्यावी. (२) २७

فَلَوْلَا نَصَرَهُمُ الَّذِينَ اتَّخَذُوا مِن دُونِ اللَّهِ قُرْبَانًا
آلِهَةً ۖ بَلْ ضَلُّوا عَنْهُمْ ۚ وَذَٰلِكَ إِفْكُهُمْ وَمَا
كَانُوا يَفْتَرُونَ ﴿٢٨﴾

तर अल्लाहचे सानिध्य प्राप्त करण्यासाठी, त्यांनी अल्लाहच्या शिवाय ज्यांना ज्यांना आपला उपास्य बनवून ठेवले होते, त्यांनी त्यांची मदत का केली नाही? किंबहुना तर त्यांच्यापासून हरवून गेलेत. (वास्तविक) हे त्यांचे खोटे आणि कुभांड होते. (३) २८

وَإِذْ صَرَفْنَا إِلَيْكَ نَفَرًا مِّنَ الْجِنِّ يَسْتَمِعُونَ الْقُرْآنَ
فَلَمَّا حَضَرُوهُ قَالُوا أَنصِتُوا ۖ فَلَمَّا قُضِيَ وَلَّوْا
إِلَىٰ قَوْمِهِم مُّنذِرِينَ ﴿٢٩﴾

आणि (आठवण करा) जेव्हा की आम्ही जिन्नांतांच्या एका समूहाला, तुझ्याकडे वळविले. की त्यांनी कुरआन ऐकावे. मग जेव्हा ते (पैगंबरांजवळ) पोहचून गेले, (एक दुसऱ्याला) म्हणू लागले, चूप बसा! (४) मग जेव्हां(कुरआनाचे) वाचन संपले, (५) तेव्हा आपल्या लोकांना सावध करण्यासाठी परत फिरून गेलेत. २९

قَالُوا يَا قَوْمَنَا إِنَّا سَمِعْنَا كِتَابًا أُنزِلَ مِن بَعْدِ
مُوسَىٰ مُصَدِّقًا لِّمَا بَيْنَ يَدَيْهِ يَهْدِي إِلَى الْحَقِّ
وَإِلَىٰ طَرِيقٍ مُّسْتَقِيمٍ ﴿٣٠﴾

म्हणू लागले अहो आमच्या समाजबंधुनो! आम्ही खचित्च ते पुस्तक ऐकले आहे, जे मूसाच्या नंतर अवतरित करण्यांत आले आहे. जे आपल्या पूर्वीच्या पुस्तकांना खरे ठरवणारे आहे. जे सत्यधर्म आणि सरळमार्गाकडे मार्गदर्शन करते. ३०

يَا قَوْمَنَا أَجِيبُوا دَاعِيَ اللَّهِ وَآمِنُوا بِهِ يَغْفِرْ لَكُم
مِّن ذُنُوبِكُمْ وَيُجِرْكُم مِّنْ عَذَابٍ أَلِيمٍ ﴿٣١﴾

अहो आमच्या लोकांनो! अल्लाहकडे बोलाविणाऱ्याचा कह्या माना. त्याच्यावर ईमान (६) आणा. तर अल्लाह तुमचे काही अपराध क्षमा करून टाकेल. आणि तुम्हास यातनादायक शिक्षेपासून वाचवून घेईल. (७) ३१

وَمَن لَّا يُجِبْ دَاعِيَ اللَّهِ فَلَيْسَ بِمُعْجِزٍ فِي الْأَرْضِ
وَلَيْسَ لَهُ مِن دُونِهِ أَوْلِيَاءُ ۚ أُولَٰئِكَ فِي ضَلَالٍ
مُّبِينٍ ﴿٣٢﴾

आणि जो मनुष्य अल्लाहच्या बोलाविणाऱ्याचा कह्या मानणार नाही, तर तो पृथ्वीत कोठे (पळून, अल्लाहला) थकवू शकत नाही. (८) न कोणी, अल्लाहच्या शिवाय आणखी कोणी त्याचे मददगार (९) होतील; असे लोक धडधडीत बहकलेले आहेत. ३२

أَوَلَمْ يَرَوْا أَنَّ اللَّهَ الَّذِي خَلَقَ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضَ
وَلَمْ يَعْيَ بِخَلْقِهِنَّ بِقَادِرٍ عَلَىٰ أَن يُحْيِيَ الْمَوْتَىٰ ۚ
بَلَىٰ إِنَّهُ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرٌ ﴿٣٣﴾

काय ते पहात नाहीत की ज्या अल्लाहने आकाशांना आणि पृथ्वीला निर्माण केले, आणि त्याच्या निर्माण करण्याने तो थकला नाही, तो खचित्च मृतांना जिवंत करण्यास समर्थ आहे? का नाही? निश्चितच तो प्रत्येक गोष्टीवर सामर्थ्यवान आहे. (१०) ३३

وَيَوْمَ يُعْرَضُ الَّذِينَ كَفَرُوا عَلَى النَّارِ أَلَيْسَ
هَٰذَا بِالْحَقِّ ۖ قَالُوا بَلَىٰ وَرَبِّنَا ۚ قَالَ فَذُوقُوا
الْعَذَابَ بِمَا كُنتُمْ تَكْفُرُونَ ﴿٣٤﴾

ते लोक ज्यांनी कुफ्र केले, ज्या दिवशी नरकाग्नीच्या समोर आणले जातील, आणि (त्यांना सांगण्यांत येईल की,) काय हे सत्य नाही ? तर उत्तर देतील की होय! शपथ आहे आमच्या पालनकर्त्याची! (११) (हे सत्य आहे.) (अल्लाह) फर्माविल, आताआपल्या कुफ्रच्या बदल्यांत शिक्षेची गोडी चाखा (१२) ३४

१) जवळपास ने आद, समूद आणि लूतच्या त्या वस्त्या अभिप्रेत आहेत, ज्या हिजाजच्या जवळच होत्या. आणि यमन, सीरिया आणि पॅलेस्टॅईनकडे येत जात, त्यांचे यांच्या वरून येणे जाणे होत असे.

२) म्हणजे आम्ही वेगवेगळ्या प्रकारे आणि वेगवेगळ्या प्रकारची प्रमाणे त्यांच्या समोर सादर केलीत की, कदाचित् ते पश्चात्ताप व्यक्त करून घेतील. परंतु ते आपल्याच गोष्टीवर अडून राहिलेत.

३) म्हणजे ज्या उपास्यांना ते अल्लाहच्या जवळीकेचे साधन समजत होते, त्यांनी त्यांची काही मदत केली नाही, तथापि ते त्यावेळी आलेच नाही. अपितु गायब राहिले, याच्याने माहित झाले की, मक्केचे मुशरिक मूर्त्यांना उपास्य समजत नव्हते. परंतु त्यांना अल्लाहतआलाच्या दरबारात जवळीकचे साधन... आणि वशीला समजत होते,

अल्लाहने त्या वशिल्याला येथे खोटे आणि कुभांड ठरवून स्पष्ट करून दिले की हे अयोग्य आणि हराम आहे.
४) सहीह मुस्लिम च्या रिवायतीने ठाऊक होते की, ही घटना मक्केच्या जवळ, 'नखला' दरी मध्ये सामोरी आली. जेथे आपण (ﷺ) सहाबा कराम (ﷺ) ला फज्रची नमाज पढवीत होते. जिन्नांचा शोध घेणे चालू होते की, आकाशांत आमच्यासाठी फारच सक्ती करून देण्यांत आली आहे. आणि आतांआमचे तेथे जाणे जवळ जवळ बंद करून देण्यांत आले आहेत. कोणी फारच मोठी घटना घडलेली आहे. ज्याच्या परिणामांत हे असे झाले आहे. म्हणून पूर्व आणि पश्चिमेच्या वेगवेगळ्या भागांत, जिन्नांच्या टोळ्या, घटनेचा शोध लावण्यासाठी पसरून गेल्यांत. यांच्यातून एका टोळीने हे कुरआन ऐकले. आणि ही गोष्ट समजून घेतली की, नबी ﷺ च्या पैगंबरीची ही घटनाच आमच्या आकाशबंदीचे कारण आहे. आणि जिन्नांची ही टोळी आपल्यावर ईमान घेऊन आली. आणि परत जाऊन आपल्या लोकांना पण सांगितले (स.मुस्लिम) स.बुखारी मध्ये सुद्धा काही गोष्टींचा उल्लेख आहे. काही दुसऱ्या रिवायतीने माहित होते की, आपण (ﷺ) जिन्नांच्या आमंत्रणावर त्यांच्या तेथे सुद्धा गेले. आणि त्यांना जाऊन अल्लाहचा संदेश ऐकविला. आणि अनेक वेळा, जिन्नांचे शिष्टमंडळ आपल्या सेवेत पण हजर झाले. (फत्हुल बारी, तफसीर इब्ने कसीर, वगैरे)
५) म्हणजे आपण ﷺ कडून कुरआनाचे पठण संपले.
६) हे जिन्नांनी आपल्या लोकांना नबी ﷺ च्या पैगंबरीवर ईमान आणण्याचे आमंत्रण दिले. याच्यापूर्वी कुरआन करीमने या संबंधीत सांगितले की, हे तौरात नंतर एक आणखी आकाशी पुस्तक आहे, जे खरा धर्म आणि सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करते.
७) हे ईमान आणण्याचे ते फायदे सांगितले, जे परलोकांत त्यांना मिळतील. म्हणजे काही गुन्हे क्षमा करून टाकीन. आणि हे ते गुन्हे असतील, ज्यांचा संबंध अल्लाहच्या हक्काशी असेल. कारण की सेवकांचे हक्क माफ केले जाणार नाही. हे महावाक्य या गोष्टीचे प्रमाण आहे की, पुण्यप्रतिफळ आणि शिक्षा आणि निषीद्ध आणि मना केलेल्या गोष्टी, जिन्नातांसाठी सुद्धा त्याच हुकूमांत आहेत, जे मनुष्यांसाठी आहेत.
या हुकूमांत ज्ञानी लोकांचा मतभेद आहे की, अल्लाहतआलाने जिन्नातांमध्ये, जिन्नातच पैगंबर पाठविले किंवा नाही? उघड कुरआनाच्या महावाक्याने असेच वाटते की, जिन्नातांमध्ये कोणी पैगंबर झाला नाही. सर्व पैगंबर मनुष्यांमध्येच झाले आहेत. ''आपल्या पूर्वी सुद्धा आम्ही मनुष्यांनाच पाठवित राहिलो आहे. ज्यांच्याकडे वह्य उतारत असू. (सू.नहल-४३) ''आम्ही आपल्यापूर्वी जेवढे पैगंबर पाठविले, सर्वच्या सर्व जेवणही करीत असत; आणि बाजारांत सुद्धा चालत फिरत असत.'' (सू.फुर्कान-२०) कुरआनाच्या या महावाक्याने स्पष्ट आहे की, जेवढे पण पैगंबर झाले, ते मनुष्यच होते. म्हणून रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि सल्लम, ज्याप्रमाणे मनुष्यांकरीता पैगंबर होते आणि आहेत. अशाच प्रकारे जिन्नातांचे पैगंबरपण आपणच आहात. आणि आपला संदेशपण जिन्नातांपर्यंत पोहचविण्याची व्यवस्थापण केली गेली आहे. जसे की कुरआन करीमच्या या स्थानावरून जाहीर आहे.
८) म्हणजे असे होऊ शकत नाही की, ते पृथ्वीच्या विस्तृत्वांत अशा प्रकारे हरवून जावेत की, अल्लाहच्या पकडीत येऊ शकू नये.
९) जे त्याला अल्लाहच्या शिक्षेपासून वांचवून घेतील. अर्थ हा झाला की, न ते स्वत: अल्लाहच्या पकडीपासून वांचण्यास समर्थ आहे, न कोण्या दुसऱ्याच्या मदतीने असे शक्य आहे.
१०) जाणण्याने येथे अंत:करणाचे जाणणे आहे. म्हणजे काय त्यांनी जाणले नाही. 'अलम् यालमु' किंवा अलम् यत फक्करू, की जो अल्लाह् आकाश आणि पृथ्वीचा निर्माणकर्ता आहे. ज्यांचा विस्तृततेचा काही अंतच नाही; आणि तो यांना बनवून थकला पण नाही; काय तो मृतांना दुसऱ्यांदा जिवंत करू शकला नाही? खचित्च करू शकतो. यासाठी की तो 'अला कुल्ली शय्अिन कदीर' चे वैशिष्ट धारण करणारा आहे.
११) तेथे मान्यच करणार नाही, किंबहुना आपल्या या मान्यतेवर शपथ खाऊन, त्याची ताकीद करतील. परंतु त्यावेळचे हे खरे मानणे काही फायदा देणार नाही. कारण की प्रत्यक्ष पाहिल्यानंतर, खरे मानण्याला काय महत्त्व असूंशकते ? डोळ्यांनी पाहून घेतल्यानंतर, खरे मानणार नाही तर काय इन्कार करतील?
१२) यासाठी की, जेव्हा मानण्याचा वेळ होता, तेव्हा मानले नाही. ही शिक्षा त्याच कुफ्र आणि इन्कारचा बदला आहे. जो आता तुम्हास भोगावयाचा म्हणजे भोगावयाचा आहे.

فَاصْبِرْ كَمَا صَبَرَ أُولُوا الْعَزْمِ مِنَ الرُّسُلِ وَلَا تَسْتَعْجِلْ لَّهُمْ ۚ كَأَنَّهُمْ يَوْمَ يَرَوْنَ مَا يُوعَدُونَ لَمْ يَلْبَثُوا إِلَّا سَاعَةً مِّن نَّهَارٍ ۚ بَلَاغٌ ۚ فَهَلْ يُهْلَكُ إِلَّا الْقَوْمُ الْفَاسِقُونَ ﴿٣٥﴾

तर (हे पैगंबरा!) तुम्ही असे सहन करा, जसे सहन (इतर) हिम्मतवाल्या पैगंबरांनी केले. आणि यांच्याकरीता (शिक्षेची मागणी करण्यांत) घाई करू नका;[१] हे ज्या दिवशी या शिक्षेला पाहून घेतील, जिचा वायदा यांच्याशी केला जातो तेव्हा, (असे वाटू लागेल की) दिवसाची एक घटकात (हे जगांत) राहिले.[२] हे आहे संदेश पोहचवून देणे,[३] आज्ञाभंजकांशिवाय कोणीही नष्ट केले जाणार नाही.[४] (३५)

## (४७) सू. मोहम्मद

महावाक्ये ३८ | रुकूअ ४

(٤٧) سُورَةُ مُحَمَّدٍ مَدَنِيَّةٌ (٩٥) — اٰيَاتُهَا ٣٨ — رُكُوْعَاتُهَا ٤

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

الَّذِينَ كَفَرُوا وَصَدُّوا عَن سَبِيلِ اللَّهِ أَضَلَّ أَعْمَالَهُمْ ﴿١﴾

ज्या लोकांनी कुफ्र केले, आणि अल्लाहच्या मार्गापासून अडविले[५] अल्लाहने त्यांची कर्मे अक्रित करुन टाकलीत[६] (१)

وَالَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ وَآمَنُوا بِمَا نُزِّلَ عَلَىٰ مُحَمَّدٍ وَهُوَ الْحَقُّ مِن رَّبِّهِمْ ۙ كَفَّرَ عَنْهُمْ سَيِّئَاتِهِمْ وَأَصْلَحَ بَالَهُمْ ﴿٢﴾

आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कामे केलीत. आणि त्यावर पण विश्वास ठेवला जे मुहम्मद (सल्ल.) वर अवतीर्ण केले गेले आहे.[७] आणि वास्तविक त्यांच्या पालनकर्त्याकडून खरा (धर्म) पण तोच आहे. अल्लाहने त्यांचे अपराध दूर करुन टाकले[८] आणि त्यांची स्थितीपण सुधारली[९] (२)

१) ह्या मक्केच्या काफिरांच्या वर्तणुकीच्या मुकाबल्यात, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची सांत्वना केली जात आहे. आणि सहनशिलता पत्करण्याचा उपदेश केला जात आहे.

२) कयातमची महाभयानक शिक्षा पाहिल्यानंतर, त्यांना ऐहिक जीवन असेच वाटेल, जसे दिवसाची एक घटका तेथे घालवून गेले आहेत.

३) हा उपदेश किंवा संदेश पोहचविणे तुझे काम आहे.

४) या महावाक्यासाठी सुद्धा ईमानवाल्यांसाठी खुषखबर आणि धैर्य देणे आहे की, परलोकांतील गारद होणे फक्त त्या लोकांच्या वाट्याला आहे जे अल्लाहचे आज्ञाभंजक आणि त्याच्या मर्यादांना पायदळी तुडविणारे आहेत.

५) काहींनी याच्याने अभिप्रेत कुरैशचे काफिर आणि काहींनी ग्रंथधारी लोक धरले आहेत. परंतु हे सर्वसाधारण आहे. यांच्या समवेत सर्वच काफिर यांच्यात दाखल आहेत.

६) याचा एक अर्थ तर हा आहे की, यांनी नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या विरूद्ध जी कारस्थाने केलीत, अल्लाहने त्यांना अयशस्वी करून टाकले. आणि त्यांच्यावरच त्यांना उलटवून टाकले. दुसरा अर्थ आहे की, याच्यांत जे काही सद्चारित्र्य लोक आढळून येत होते, उदाहरणार्थ नाते संबंध कायम ठेवणे, कैद्यांना स्वतंत्र करणे, पाहुणचार वगैरे किंवा खाना-ए-काबा आणि हज यात्रेकरूंची सेवा, यांचा काही मोबदला त्यांना परलोकात मिळणार नाही. कारण की ईमानाशिवाय, कर्मांवर पुण्य प्रतिफल लागू केले जाणार नाही.

७) ईमानामध्ये जरी वह्य मुहम्मदी म्हणजे पवित्र कुरआनावर पण ईमान आणणे पण शामील आहे; परंतु याचे महत्त्व आणि प्रतिष्ठेला आणखी जास्त स्पष्ट आणि ठळक करण्यासाठी, याचा वेगळा उल्लेखपण करून दिला.

८) म्हणजे ईमान आणण्याच्या पूर्वीच्या चुका आणि कोताया क्षमा करुन टाकेल. जसे की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे फर्मान सुद्धा आहे की, ''इस्लाम मागील साऱ्या गुन्ह्यांना मिटवून टाकतो.'' (सहीहुल जामऊस्सगीर)

९) अर्थ आहे की त्यांना गुन्ह्यांपासून वांचवून, हिदायत आणि भलाईच्या मार्गाला लावून दिले. एका ईमानवाल्यांसाठी स्थिती सुधारण्याकरीता हेच सर्वांत चांगले स्वरुप आहे. हा अर्थ नाही की, धनसंपत्तीच्या मार्फत त्यांची स्थिती योग्य करून टाकली. कारण की प्रत्येक ईमानवाल्याला धनसंपत्ती मिळतेच असे पण नाही. याशिवाय, निव्वळ ऐहिक संपत्ती, स्थिती सुधारणेचे खात्रीशिर साधन पण नाही. किंबहुना याच्याने स्थिती बिघडण्याची शक्यताच जास्त असते. म्हणूनच नबी ﷺ नी विपूल धन संपदेला पसंत केले नाही.

ذٰلِكَ بِاَنَّ الَّذِيْنَ كَفَرُوا اتَّبَعُوا الْبَاطِلَ وَاَنَّ الَّذِيْنَ
اٰمَنُوا اتَّبَعُوا الْحَقَّ مِنْ رَّبِّهِمْ ۭ كَذٰلِكَ يَضْرِبُ اللّٰهُ
لِلنَّاسِ اَمْثَالَهُمْ ۝۳

**हे यासाठी [१] की, काफिरांनी असत्याचे अनुकरण केले; आणि ईमानवाल्यांनी या सत्य धर्माचे अनुपालन केले, जे त्यांच्या अल्लाहकडून आहे. अल्लाहतआला लोकांना त्याचे अहवाल अशाच प्रकारे दाखवीत असतो. [२] ③**

فَاِذَا لَقِيْتُمُ الَّذِيْنَ كَفَرُوْا فَضَرْبَ الرِّقَابِ ۭ حَتّٰٓى اِذَآ
اَثْخَنْتُمُوْهُمْ فَشُدُّوا الْوَثَاقَ ڎ فَاِمَّا مَنًّۢا بَعْدُ وَ اِمَّا
فِدَاۗءً حَتّٰى تَضَعَ الْحَرْبُ اَوْزَارَهَا ڃ ذٰلِكَ ڔ وَلَوْ
يَشَاۗءُ اللّٰهُ لَانْتَصَرَ مِنْهُمْ ۙ وَلٰكِنْ لِّيَبْلُوَا۟ بَعْضَكُمْ
بِبَعْضٍ ۭ وَالَّذِيْنَ قُتِلُوْا فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ فَلَنْ
يُّضِلَّ اَعْمَالَهُمْ ۝۴

**तर जेव्हा काफिरांशी धमासान युद्ध होऊन जाईल, तेव्हा त्यांच्या मानांवर वार करा. [३] जेव्हा त्यांचा खूप जोर मोडून चुकाल, तर आता मोठ्या मजबुतीने तुम्ही त्यांच्या मुसक्या बांधून टाका. [४] मग (तुम्हास अधिकार आहे की) उपकार ठेवून सोडून द्या किंवा प्राणमूल्य [५] घेऊन; येथ पावेतो की, लढाई आपली हत्यारे ठेवून देईल. [६] हाच हुकूम [७] आहे, आणि जर अल्लाह इच्छिता, तर (स्वत:च) यांच्याकडून बदला घेऊन घेता; [८] परंतु (त्याची इच्छा ही आहे की,) तुमच्यातून एकाची परीक्षा दुसऱ्याकडून घेऊन घ्यावी. [९] जे लोक अल्लाहच्या मार्गात मारले जातात, अल्लाह त्यांची कर्मे कधीच अक्रित [१०] करणार नाही. ④**

१) हा इशारा आहे त्या धमक्या आणि वायद्यांकडे काफिर आणि ईमानवाल्यांसाठी सांगितली गेलीत.

२) कारण की लोकांनी त्या परिणामापासून वांचावे, जो काफिरांच्या नशीबी आहे. आणि तो सरळ मार्ग अंगीकारावा, ज्यावर चालून ईमानवाले सफलता आणि कायमच्या यशापर्यंत पोहचतील.

३) जेव्हा दोन्ही पक्षांचा उल्लेख करुन दिला तर आता काफिर आणि ज्यांच्याशी करार झालेला नाही, असे ग्रंथधारी लोक यांच्याशी जिहाद करण्याचा हुकूम दिला जात आहे. ठार मारण्याच्या ऐवजी माना उडविण्याचा हुकूम दिला; की या युक्तीत काफिरांशी कठोरता आणि सक्तीचे जास्त प्रदर्शन आहे (फत्हुल कदीर)

४) म्हणजे जोरदार मोर्चे बांधणी, आणि जास्तीत जास्त त्यांना ठार केल्यानंतर, त्यांचा, जी माणसे काबूत येऊन जातील, त्यांना कैदी बनवून घ्या; आणि मजबुतीने त्यांना जकडून ठेवा, कारण की त्यांनी पळून जाऊ शकूं नये.

५) 'मन्न' चा अर्थ आहे, प्राणमूल्य घेतल्याशिवाय, एक उपकार म्हणून सोडून देणे. आणि 'फिदाअन' चा अर्थ आहे, काही मोबदला घेऊन सोडून देणे, कैद्यांच्या बाबतीत अधिकार देऊन देण्यांत आला, जे स्वरुप परिस्थितीच्या बाबतीत आणि मुसलमानांच्या बाबतीत जास्त उत्तम असेल, ते अंगिकारले जावे.

६) म्हणजे काफिरांबरोबर युद्ध संपून जाईल, किंवा अभिप्रेत आहे की, म्हणजे लढणारा शत्रू पराजीत होऊन किंवा तह करून शस्त्रे ठेवून देईल किंवा इस्लाम प्रबळ होऊन जाईल, आणि कुफ्र संपून जाईल. अर्थ हा आहे की, जोपर्यंत ही सद्यस्थिती होऊन न जाईल, काफिरांबरोबर तुमची मोर्चेबांधणी चालू राहील ज्यांत तुम्ही त्यांना ठार पण कराल. कैद्यांमध्ये तुम्हाला चर्चित दोन्ही गोष्टींचा अधिकार आहे. काही म्हणतात, हे महावाक्य रद्द झालेले आहे. आणि ठार मारण्याशिवाय कुठलेही स्वरूप बाकी नाही. परंतु बरोबर गोष्ट हीच आहे की हे वाक्य रद्द नाही, (जसेच्या तसे) पक्के आहे. आणि त्या वेळेच्या बादशाहाला चारही गोष्टींचा अधिकार आहे. काफिरांना ठार करणे किंवा कैदी बनवून घेणे, कैद्यांमधून ज्याला किंवा सर्वांना उपकार म्हणून सोडून देणे किंवा मोबदला घेऊन सोडून देणे. (फत्हुल कदीर)

७) किंवा तुम्ही अशा प्रकारे करा.

८) म्हणजे काफिरांना नष्ट करून किंवा त्यांना शिक्षेत व्यस्त करून. म्हणजे तुम्हास त्यांच्याशी लढण्याची आवश्यकताच पडली नसती.

९) म्हणजे तुमची एक दुसऱ्याच्या मार्फत परीक्षा घ्यावी. कारण की त्याने जाणून घ्यावे की, तुमच्यातून त्याच्या मार्गात लढणारे कोण आहेत? कारण की त्यांना पुण्यप्रतिफळ द्यावे. आणि त्याच्या हातून काफिरांना फजिती आणि पराजयांत व्यस्त करावे.

१०) म्हणजे त्यांचा मोबदला आणि पुण्यप्रतिफळ अक्रित करणार नाही.

| | |
|---|---|
| त्यांना मार्ग दाखवील आणि त्यांची अंतर्दशा सुधारील.[१] ⑤ | سَيَهْدِيهِمْ وَيُصْلِحُ بَالَهُمْ ﴿٥﴾ |
| आणि त्यांना त्या स्वर्गांत घेऊन जाईल, ज्याची ओळख त्यांना पूर्वीच करून देण्यात आली आहे.[२] ⑥ | وَيُدْخِلُهُمُ الْجَنَّةَ عَرَّفَهَا لَهُمْ ﴿٦﴾ |
| हे ईमानवाल्यांनो! जर तुम्ही अल्लाहच्या (धर्माची) मदत कराल. तर तो तुमची मदत करेल[३] आणि तुमचे पाय दृढ जमवून ठेवेल[४] ⑦ | يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا إِن تَنصُرُوا اللَّهَ يَنصُرْكُمْ وَيُثَبِّتْ أَقْدَامَكُمْ ﴿٧﴾ |
| आणि जे लोक काफिर झालेत, त्यांना गारद होणे असो! अल्लाह त्यांची कर्मे अक्रित करून टाकेल. ⑧ | وَالَّذِينَ كَفَرُوا فَتَعْسًا لَّهُمْ وَأَضَلَّ أَعْمَالَهُمْ ﴿٨﴾ |
| हे यासाठी की ते अल्लाहच्या अवतरीत केलेल्या वस्तुने नाखूष झालेत.[५] तर अल्लाहतआलाने (सुद्धा) त्यांची कर्मे अक्रित करून टाकलीत[६] ⑨ | ذَٰلِكَ بِأَنَّهُمْ كَرِهُوا مَا أَنزَلَ اللَّهُ فَأَحْبَطَ أَعْمَالَهُمْ ﴿٩﴾ |
| काय यांनी पृथ्वीत चालून फिरून याची पाहणी केली नाही की यांच्या पूर्वीच्या लोकांचा काय परिणाम झाला?[७] अल्लाहने त्यांना गारद करून टाकले. आणि काफिरांकरीता अशाच प्रकारच्या शिक्षा आहेत.[८] ⑩ | أَفَلَمْ يَسِيرُوا فِي الْأَرْضِ فَيَنظُرُوا كَيْفَ كَانَ عَاقِبَةُ الَّذِينَ مِن قَبْلِهِمْ ۖ دَمَّرَ اللَّهُ عَلَيْهِمْ ۖ وَلِلْكَافِرِينَ أَمْثَالُهَا ﴿١٠﴾ |
| हे यासाठी की ईमानवाल्यांचा मददगार स्वत: अल्लाहतआला आहे. आणि यासाठी की, काफिरांचा कोणी मददगार नाही.[९] ⑪ | ذَٰلِكَ بِأَنَّ اللَّهَ مَوْلَى الَّذِينَ آمَنُوا وَأَنَّ الْكَافِرِينَ لَا مَوْلَىٰ لَهُمْ ﴿١١﴾ |

१) म्हणजे त्यांना अशा कामाची सुबुद्धी देईल, ज्यामुळे त्यांचा स्वर्गाचा मार्ग सुकर होईल.

२) म्हणजे ज्याला ते कुठल्याही मार्गदर्शनाशिवाय ओळखून घेतील. आणि जेव्हा ते स्वर्गांत दाखल होतील तर स्वत:च आपआपल्या घरांत जाऊन दाखल होतील. याचे समर्थन एका हदीशीने सुद्धा होते. ज्यात नबी ﷺ नी फर्माविले, ''शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची! ज्याच्या हातात माझे प्राण आहे, एका स्वर्गवाश्याला आपल्या स्वर्गातील घराच्या रस्त्यांचे यापेक्षा किती तरी जास्त ज्ञान असेल. जेवढे जगांत त्याला आपल्या घराचे होते.'' (स.बुखारी)

३) अल्लाहची मदत करण्याचा अर्थ, अल्लाहच्या धर्माची मदत आहे. कारण की तो सबबीप्रमाणे, आपल्या धर्माची मदत आपल्या ईमानवाल्या सेवकांकडूनच करीत असतो. हे ईमानवाले सेवक अल्लाहच्या धर्माचे संरक्षण आणि त्यांचा प्रचार आणि प्रसार करतात. तेव्हा अल्लाहतआला त्यांची मदत करतो. म्हणजे त्यांना काफिरांवर विजय आणि वर्चस्व बहाल करतो. जसा सहाबा किराम रिजवानुल्लाह् अलैहिम अजमईन आणि कुरूने उला (सहाबांचा काळ) च्या मुसलमानांचा तेजपुंज इतिहास आहे; ते धर्माचे होऊन गेले होते, तर अल्लाह पण त्यांचा होऊन गेला होता. त्यांनी धर्माला वर्चस्व प्राप्त करून दिले तर अल्लाहने त्यांना पण जगावर वर्चस्व प्राप्त करून दिले. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''अल्लाह त्याची अवश्य मदत करतो. जो त्याची मदत करितो.'' (सू.हज्ज-४०)

४) म्हणजे युद्धाच्या वेळेला पाय दृढ जमवून ठेवणे. काही म्हणतात की, इस्लाम किंवा पुलसिरात वर पाय दृढ जमवून ठेवेल.

५) म्हणजे कुरआन आणि ईमानाला त्यांनी नापसंद केले.

६) कर्मांनी अभिप्रेत ती कर्मे आहेत, जी उघड भलाईची कर्मे आहेत. परंतु ईमान नसल्यामुळे अल्लाहच्या जवळ यांच्यावर मोबदला आणि पुण्य प्रतिफळ मिळणार नाही.

७) ज्यांचे पुष्कळशे अवशेष त्यांच्या इलाख्यांत आढळून येतात. कुरआनाच्या अवतरणाच्या वेळेस काही नष्ट झालेल्या लोकांचे भग्नावशेष आणि निशाण्या अस्तित्वात होत्या. म्हणून त्यांना चालून फिरून, त्यांचे बोध घेण्यासारखे परिणाम पाहण्याकडे लक्ष वेधले गेले. की कदाचित् त्यांना पाहूनच यांनी ईमान घेऊन यावे.

८) हे मक्केवाल्यांना भिवविण्यांत येत आहे, की जर तुम्ही कुफ्रपासून माघार घेतली नाही, तर तुमच्या करता सुद्धा अशीच शिक्षा होऊ शकते? आणि होऊन चुकलेल्या काफिर लोकांच्या गारद केल्याप्रमाणे तुम्हालापण गारद केले जाऊ शकते.

९) म्हणून उहदच्या युद्धात, काफिरांच्या घोषणांच्या उत्तरांत, मुसलमानांनी ज्या घोषणा मोठ्याने दिल्या. उदाहरणार्थ अअलु हुबल, अअलु हुबल (हुबल मूर्तीचा विजय असो) च्या उत्तरांत ''अल्लाहु अअ्ला व अजल्ल'' मुसलमानांनी अशा घोषणा दिल्या.

إِنَّ اللَّهَ يُدْخِلُ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۖ وَالَّذِينَ كَفَرُوا يَتَمَتَّعُونَ وَيَأْكُلُونَ كَمَا تَأْكُلُ الْأَنْعَامُ وَالنَّارُ مَثْوًى لَّهُمْ ﴿١٢﴾

ज्या लोकांनी ईमान आणले आणि त्यांनी चांगली कामे केलीत, त्यांना अल्लाहतआला खचितच अशा बागांमध्ये दाखल करेल, ज्यांच्या खाली पाण्याचे पाट वाहत असतील. आणि जे लोक काफिर झालेत, ते (इहलोकाचाच) फायदा उचलीत आहे. आणि चतुष्पाद जनावरांसारखे खात आहे.[१] त्यांचे (खरे) ठिकाण नरकाग्नी आहे. (१२)

وَكَأَيِّن مِّن قَرْيَةٍ هِيَ أَشَدُّ قُوَّةً مِّن قَرْيَتِكَ الَّتِي أَخْرَجَتْكَ أَهْلَكْنَاهُمْ فَلَا نَاصِرَ لَهُمْ ﴿١٣﴾

आम्ही कित्येक वस्त्यांना, जे शक्तीत तुझ्या या वस्तीपेक्षा कितीतरी जास्त होते, जिने तुला काढले, गारद करून टाकले आहे, ज्यांचा कोणी मददगार उभा राहिला नाही. (१३)

أَفَمَن كَانَ عَلَىٰ بَيِّنَةٍ مِّن رَّبِّهِ كَمَن زُيِّنَ لَهُ سُوءُ عَمَلِهِ وَاتَّبَعُوا أَهْوَاءَهُم ﴿١٤﴾

तर काय तो मनुष्य जो आपल्या पालनकर्त्याकडून प्रमाणावर असावा, या माणसा सारखा होऊ शकतो? ज्याच्या करीता त्याचे कुकृत्य सुशोभित बनवून दिले गेले असेल आणि तो आपल्या मनेच्छेचे अनुकरण करणारा[२] असेल. (१४)

مَّثَلُ الْجَنَّةِ الَّتِي وُعِدَ الْمُتَّقُونَ ۖ فِيهَا أَنْهَارٌ مِّن مَّاءٍ غَيْرِ آسِنٍ وَأَنْهَارٌ مِّن لَّبَنٍ لَّمْ يَتَغَيَّرْ طَعْمُهُ وَأَنْهَارٌ مِّنْ خَمْرٍ لَّذَّةٍ لِّلشَّارِبِينَ وَأَنْهَارٌ مِّنْ عَسَلٍ مُّصَفًّى ۖ وَلَهُمْ فِيهَا مِن كُلِّ الثَّمَرَاتِ وَمَغْفِرَةٌ مِّن رَّبِّهِمْ ۖ كَمَنْ هُوَ خَالِدٌ فِي النَّارِ وَسُقُوا مَاءً حَمِيمًا فَقَطَّعَ أَمْعَاءَهُمْ ﴿١٥﴾

या स्वर्गाचे वैशिष्ट्य, ज्याचा अल्लाहला भिणाऱ्यांशी वायदा केला गेला आहे, हे आहे की, याच्यांत पाण्याचे पाट आहेत, ज्यांत नावासही वास नाही.[३] आणि दुधाच्या नद्या आहेत, ज्यांची रूची बदललेली नाही.[४] आणि मद्याच्या नद्या आहेत, ज्यांत पिणाऱ्यांसाठी मोठा स्वाद आहे.[५] आणि मधाच्या नद्या आहेत ज्या फार स्वच्छ आहेत.[६] आणि त्यांच्यासाठी तेथे प्रत्येक प्रकारची फळे आहेत. आणि त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमा आहे, काय ते त्याच्या सारखे आहेत जो नेहमी आगीत रहाणारा आहे? आणि ज्यांना गरम उकळी आलेले पाणी पाजण्यांत येईल; ज्याने त्याच्या आंतड्या तुकडे तुकडे होऊन जातील.[७] (१५)

وَمِنْهُم مَّن يَسْتَمِعُ إِلَيْكَ حَتَّىٰ إِذَا خَرَجُوا مِنْ عِندِكَ قَالُوا لِلَّذِينَ أُوتُوا الْعِلْمَ مَاذَا قَالَ آنِفًا ۚ أُولَٰئِكَ الَّذِينَ طَبَعَ اللَّهُ عَلَىٰ قُلُوبِهِمْ وَاتَّبَعُوا أَهْوَاءَهُمْ ﴿١٦﴾

आणि यांच्यातून काही (असे पण आहेत की,) तुझ्याकडे लक्ष देऊन ऐकतात, येथ पावेतो की जेव्हा तुझ्या जवळून (परत) जातात तर ज्ञानी लोकांना (बुद्धी मांद्यामुळे) विचारतात की, याने आता काय सांगितले होते?[८] हेच लोक आहेत ज्यांच्या अंत:करणावर अल्लाहने मोहोर लावून टाकली आहे. आणि ते आपल्या मनेच्छेचे अनुकरण करतात. (१६)

وَالَّذِينَ اهْتَدَوْا زَادَهُمْ هُدًى وَآتَاهُمْ تَقْوَاهُمْ ﴿١٧﴾

आणि जे लोक सन्मार्गोन्मुख आहेत, अल्लाह त्यांना अधिकाधिक सन्मार्ग दाखवितो. आणि त्यांना त्यांचे अल्लाहला भिऊन वागणे बहाल केले आहे.[९] (१७)

فَهَلْ يَنظُرُونَ إِلَّا السَّاعَةَ أَن تَأْتِيَهُم بَغْتَةً ۖ فَقَدْ جَاءَ أَشْرَاطُهَا ۚ فَأَنَّىٰ لَهُمْ إِذَا جَاءَتْهُمْ ذِكْرَاهُمْ ﴿١٨﴾

तर हे तर फक्त कयामतची वाट पाहत आहेत की, तिने यांच्याजवळ अचानक येऊन जावे. खचितच तिच्या निशाण्या तर येऊन चुकल्या आहेत.[१०] मग जेव्हा यांच्याजवळ कयामत येऊन ठेपेल, तर त्यांना उपदेश करणे कोठे असेल?[११] (१८)

१) म्हणजे ज्याप्रमाणे जनावरांना पोट आणि लैंगिक इच्छाचे तगादे पूर्ण करण्याच्या शिवाय, काही काम नसते; हीच स्थिती काफिरांची आहे. त्यांच्या जीवनाचा उद्देश्य पण खाण्या पिण्याशिवाय आणखी काही नाही. परलोकाकडून ते बिलकुल अनभिज्ञ आहेत. याच्याने इशाऱ्याने उभे उभे खाण्याच्या मनाईला पण आधार मिळतो. ज्याचा आजकाल सर्वसाधारण रिवाज आहे. कारण की याच्यांत सुद्धा जनावरांशी साम्यता आहे. ज्याला काफिरांची पद्धत दाखविण्यांत आली आहे. हदीसींमध्ये उभे उभे पाणी पिण्यांस सक्तीने मना करण्यात आले आहे. ज्याच्याने उभे उभे खाण्याची मनाई चांगल्या रीतीने सिद्ध होते. म्हणून जनावरांप्रमाणे उभे राहून खाण्यापासून वांचणे फारच आवश्यक आहे.
२) वाईट कामाने अभिप्रेत शिर्क आणि गुन्हे आहेत. अर्थ तोच आहे जो पहिले सुद्धा अनेक ठिकाणी येऊन चुकला

आहे. की ईमानवाला आणि काफिर, मुशरिक आणि फक्त एका अल्लाहला मानणारा, सुकृत्ये करणारा आणि कुकृत्ये करणारा, (हे सर्व) समान होऊ शकत नाही. एका करिता, अल्लाह जवळ मोबदला आणि पुण्यप्रतिफल आहे. आणि स्वर्गाच्या देणग्या आहेत. जेव्हा की दुसऱ्या करिता नरकाग्नीची भयानक शिक्षा. पुढील महावाक्यांत, उभयतांकरीता परिणाम वर्णन केला जात आहे. पहिले, त्या स्वर्गाच्या खुब्या आणि त्याचा चांगुलपणा, ज्यांचा वायदा अल्लाहला भिणाऱ्यांसाठी, आहे. (त्यांचे वर्णन आहे.)

३) आसिनचा अर्थ 'मुतगय्यर' म्हणजे बदलून जाणारा, 'गैर आसिन', न बदलून जाणारा. म्हणजे जगांत जर पाणी कोण्या एका ठिकाणी पडून असेल, तर त्याचा रंग बदलून जातो. आणि त्याचा वास आणि स्वादांत बदल होऊन जातो. ज्यामुळे ते आरोग्याला घातक होऊन जाते. स्वर्गाच्या पाण्याचे हे वैशिष्ट्य असेल की, त्याच्यांत काही बदल होणार नाही. म्हणजे त्याच्या वासांत आणि स्वादांत काही बदल होणार नाही. जेव्हा प्याल तेव्हा ताजे, आनंददायी, आणि आरोग्यदायक. जेव्हा की जगांतील पाणी खराब होऊ शकते. म्हणूनच धर्मशास्त्राने, पाण्याच्या बाबतीत सांगितले, हे पाणी त्या वेळेपर्यंत पवित्र आहे, जो पर्यंत त्याचा रंग आणि वास बदलणार नाही. कारण की रंग आणि वास बदलून गेल्यावर पाणी अपवित्र होऊन जाईल.

४) ज्याप्रमाणे जगांत ते दूध काहीवेळा खराब होऊन जाते, जे गायी, म्हशी, बकऱ्या वगैरेच्या स्तनांतून निघते. स्वर्गातील दूध कारण की, अशा प्रकारे जनावरांच्या स्तनांतून निघणार नाही, किंबहुना त्याच्या नद्या असतील, म्हणून, ज्याप्रमाणे ते फारच स्वादिष्ट असेल, खराब होण्यापासून पण सुरक्षित असेल.

५) जगात जे मद्य मिळते, ते सर्व साधारणपणे तीव्र, बेचव आणि दुर्गंधीयुक्त असते. याला पिऊन मनुष्य सर्वसाधारण शुद्ध हरवून बसतो, अनाफ सनाफ बकतो. आणि आपल्या शरीराचे पण त्याला भान रहात नाही.
स्वर्गातील मद्य दिसण्यास सुंदर, चवीत उत्कृष्ट, आणि फारच सुगंधीत असेल. आणि त्याला पिऊन कोणी बहकणार नाही आणि त्याला जडपणा वाटणार नाही. ज्याची कल्पना या जगांत शक्य नाही. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''न त्याच्याने चक्कर येतील, न समज जाईल.'' (सू.साफ्फात-४७, सू.वाकेआ-१९)

६) म्हणजे मधांत सर्व साधारणपणे ज्या वस्तूच्या मिलावटीची शक्यता असते, ज्याचा अनुभव जगांत सर्वांना आहे. स्वर्गात अशी काही भीती राहणार नाही. बिलकुल स्वच्छ, पारदर्शित असेल. कारण की हे जगाप्रमाणे माशांपासून मिळविलेले असणार नाही. किंबहुना त्याच्यापण नद्या असतील. म्हणूनच हदीसमध्ये येते, नबी ﷺ नी फर्माविले, ''जेव्हापण तुम्ही मागाल तेव्हा जन्नतुल फिरदौसची मागणी करा. कारण की तो स्वर्गाचा मधला आणि उंच दर्जा आहे. आणि तेथूनच स्वर्गाच्या नद्या उगम पावतात. आणि याच्याच वर परम दयाळू(अल्लाह) चे महासिंहासन आहे.'' (स.बुखारी)

७) म्हणजे ज्यांना स्वर्गांत ते उच्च दर्जे नशीबी येतील, ज्याची चर्चा झाली, काय ते अशा नर्कवासियांसारखे आहेत, ज्याची परिस्थिती अशी होईल? उघड आहे, असे होणार नाही. किंबहुना एक दर्जात असेल आणि एक दर्कात (नरकाग्नीत) एक देणग्यांची आणि सौख्याची दाद देत असेल; दुसरा नरकाग्नीच्या सक्त्या झेलत असेल. एक अल्लाहचा अतिथी असेल, जेथे त्याच्या मान सन्मानासाठी, नाना प्रकारच्या वस्तू असतील आणि दुसरा अल्लाहचा कैदी, जेथे त्याच्या खाण्याकरीता निवडुंगासारखे कडू आणि काटेरी खाद्य; आणि पिण्याकरीता उकळी आलेले पाणी मिळेल.

८) हे दांभिक लोकांचे वर्णन आहे. त्याची नियत कारण की बरोबर नसे, म्हणून नबी ﷺ च्या गोष्टीपण त्यांच्या लक्षांत येत नसत. ते सभेच्या बाहेर येऊन, सहाबांना رضي الله عنهم विचारीत की, आपण ﷺ नी काय सांगितले?

९) म्हणजे ज्यांची नियत हिदायत मिळविण्याची असते, तर अल्लाहतआला त्यांना हिदायतची सुबुद्धीपण देऊन देतो आणि त्यांना हिच्यावर दृढ जमवून पण देतो.

१०) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची पैगंबरी स्वत:च कयामत जवळ आल्याची एक निशाणी आहे.जसे की आपण फर्माविले, ''माझे पाठवले जाणे आणि कयामत या दोन बोटांसारखे आहे.'' (स.बुखारी) आपण ﷺ नी इशारा करुन स्पष्ट केले की, ज्याप्रमाणे ही दोन बोटे आपसांत मिळालेली आहेत, अशाच प्रकारे माझ्यांत आणि कयामतमध्ये अंतर नाही. किंवा हेकी, ज्या प्रमाणे एक बोट दुसऱ्या बोटाच्या पुढे जरासे आलेले आहे, अशाचप्रकारे कयामत माझ्या जराशीच नंतर आहे.

११) म्हणजे जेव्हा कयामत अचानक येऊन ठेपेल, तर काफिर कशाप्रकारे उपदेश ग्रहण करू शकतील? अर्थ असा आहे की, त्यावेळी ते जरी तौबा करतील तरी सुद्धा ती मान्य होणार नाही. यासाठी की जर तौबा करावयाची आहे, तर हीच वेळ आहे नाहीतर ती वेळ पण येऊ शकते की, त्यांची तौबा पण फायदेशीर होणार नाही.

فَاعْلَمْ اَنَّهٗ لَآ اِلٰهَ اِلَّا اللّٰهُ وَاسْتَغْفِرْ لِذَنْۢبِكَ
وَلِلْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ ۗ وَاللّٰهُ يَعْلَمُ مُتَقَلَّبَكُمْ
وَمَثْوٰىكُمْ ﴿١٩﴾

**म्हणून (अहो पैगंबर!) आपण विश्वास बाळगा अल्लाहच्या शिवाय अन्य कोणी उपास्य नाही.(१) आणि आपल्या अपराधाची क्षमा मागीत जा; आणि ईमानवाले पुरुष आणि ईमानवाल्या स्त्रिया यांच्या बाबतीत सुद्धा.(२) अल्लाह तुमच्या येण्या जाण्याच्या जागांना आणि रहाण्या सवरण्यांच्या जागांना खूप चांगल्या प्रकारे जाणतो.(३) (१९)**

وَيَقُوْلُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَوْلَا نُزِّلَتْ سُوْرَةٌ ۚ فَاِذَآ
اُنْزِلَتْ سُوْرَةٌ مُّحْكَمَةٌ وَّذُكِرَ فِيْهَا الْقِتَالُ ۙ
رَاَيْتَ الَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ يَّنْظُرُوْنَ اِلَيْكَ
نَظَرَ الْمَغْشِيِّ عَلَيْهِ مِنَ الْمَوْتِ ۗ فَاَوْلٰى لَهُمْ ﴿٢٠﴾

**आणि ज्या लोकांनी ईमान आणले, ते म्हणता कोणी अध्याय का अवतरीत केला गेला नाही?(४) मग जेव्हा कोणी स्पष्ट अर्थाचा अध्याय (५) अवतरीत केला जातो, आणि याच्यांत जिहादचा उल्लेख केला जातो, तेव्हा आपण पहातात की ज्या लोकांच्या मनांत रोग आहे, ते आपल्याकडे अशाप्रकारे पाहतात, जशी त्या माणसाची नजर होते ज्यावर मृत्यूची मुर्च्छा येते;(६) तर उचित होते त्यांच्यासाठी (२०)**

طَاعَةٌ وَّقَوْلٌ مَّعْرُوْفٌ ۫ فَاِذَا عَزَمَ الْاَمْرُ ۫ فَلَوْ
صَدَقُوا اللّٰهَ لَكَانَ خَيْرًا لَّهُمْ ﴿٢١﴾

**त्यांच्यासाठी आज्ञापालन करणे आणि चांगल्या गोष्टीचे सांगणे;(७) मग जेव्हा काम नक्की होऊन जाईल;(८) जर अल्लाहबरोबर खरे राहतील;(९) तर त्यांच्यासाठी उत्तम(१०) आहे. (२१)**

१) म्हणजे या धारणेवर दृढ आणि कायम रहावे. कारण की यावरच एकेश्वरवाद आणि अल्लाहच्या आज्ञापालनाच्या भलाईची मदार आहे. आणि यापासून फिरून जाणे म्हणजेच शिर्क आणि गुन्ह्यांच्या वाईटाची मदार आहे.

२) याच्यांत नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला क्षमायाचनेचा हुकूम दिला गेला आहे, आपल्या करीता सुद्धा आणि ईमानवाल्यांकरीता सुद्धा. क्षमायाचनेचे फार महत्त्व आणि महात्म्य आहे. हदीर्शीमध्ये सुद्धा यावर फार जोर दिला गेला आहे. एका हदीसमध्ये नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''लोकांनो! अल्लाहच्या समक्ष तौबा आणि क्षमायाचना करत जा. मी सुद्धा अल्लाहच्या समक्ष दररोज सत्तर वेळेपेक्षा जास्त तौबा आणि क्षमायाचना करतो.'' (स.बुखारी)

३) म्हणजे दिवसा तुम्ही जेथे फिरता आणि जे काही करतांआणि रात्री जेथे आराम करतांआणि थांबतात, अल्लाहतआला त्याला जाणतो. अर्थ हा आहे की, दिवस रात्रीची कुठलेही हालचाल अल्लाहपासून गुप्त नाही.

४) जेव्हा जिहादचा हुकूम अवतरीत झाला नव्हता, तेव्हा ईमानवाले, जे जिहादच्या भावनेने ओतप्रोत होते, जिहादच्या परवानगीसाठी इच्छूक होते. आणि म्हणत की, या बाबतीत कोणी अध्याय का अवतरीत केला जात नाही? म्हणजे ज्याच्यांत जिहादचा हुकूम असावा.

५) म्हणजे असा अध्याय जो रद्द न होणारा असावा.

६) हा त्या दांभिकांचा उल्लेख आहे, ज्यांना जिहादचा हुकूम फारच जड वाटत होता. याच्यात काही कमजोर ईमानवाले सुद्धा, काही वेळा शामिल होऊन जात. सू.निसाअ आ.७७ मध्ये सुद्धा हा विषय चर्चिला गेला आहे.

७) म्हणजे जिहादच्या हुकूमाने घाबरण्याच्या ऐवजी यांच्यासाठी उत्तम होते की ते ''ऐकते आणि आज्ञापालन केल्याचे प्रदर्शन करते. आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत उद्धटपणा ऐवजी चांगली गोष्ट करते. हे 'अवला' उत्तमच्या अर्थांत आहे. ज्याला इब्ने कसीरने अंगिकारले आहे. काहींनी 'अवला' ला भिवविणे आणि तंबी चे शब्द म्हणजे शाप ठरविले आहे. (त्यांचे गारद होणे जवळच आहे) अर्थ आहे यांचा भित्रेपणा आणि दांभिकत्व, याच्या नष्ट होण्याला कारणीभूत होईल.

८) म्हणजे जिहादची तयारी परिपूर्ण होऊन जावी आणि जिहादची वेळ येऊन जावी.

९) म्हणजे जर आतासुद्धा दांभिकत्व सोडून, आपली नियत अल्लाहकरिता निखालस करून घेईल किंवा रसूलच्या समोर, रसूलच्या बरोबर लढण्याचे जे वचन देतात, यांत अल्लाहशी खरे रहावे.

१०) म्हणजे दांभिकत्व आणि विरोधाच्या मुकाबल्यांत तौबा आणि निखालसपणा यांचे जाहीर करणे उत्तम आहे.

فَهَلْ عَسَيْتُمْ إِن تَوَلَّيْتُمْ أَن تُفْسِدُوا فِي الْأَرْضِ وَتُقَطِّعُوا أَرْحَامَكُمْ ﴿٢٢﴾

**आणि तुम्हास हे पण दुरापास्त नाही की जर तुम्हांस अधिकार मिळून जाईल तर तुम्ही मुलुखांत नासाडी माजवावी [१] आणि आपले आप्तसंबंध तोडून टाकावे. (२२)**

أُولَٰئِكَ الَّذِينَ لَعَنَهُمُ اللَّهُ فَأَصَمَّهُمْ وَأَعْمَىٰ أَبْصَارَهُمْ ﴿٢٣﴾

**हे तेच लोक आहेत, ज्यांच्यावर अल्लाहची फिटकार आहे. आणि ज्यांची ऐकण्याची क्षमता, आणि डोळ्यांची पाहण्याची क्षमता, हिसकावून घेण्यांत आली आहे. [२] (२३)**

أَفَلَا يَتَدَبَّرُونَ الْقُرْآنَ أَمْ عَلَىٰ قُلُوبٍ أَقْفَالُهَا ﴿٢٤﴾

**काय हे कुरआनांत चिंतन आणि मनन करीत नाहीत? का त्यांच्या अंत:करणावर त्यांची कुलुपे लागून गेली आहेत. [३] (२४)**

إِنَّ الَّذِينَ ارْتَدُّوا عَلَىٰ أَدْبَارِهِم مِّن بَعْدِ مَا تَبَيَّنَ لَهُمُ الْهُدَى ۙ الشَّيْطَانُ سَوَّلَ لَهُمْ وَأَمْلَىٰ لَهُمْ ﴿٢٥﴾

**जे लोक आपली पाठ दाखवून उलटे फिरून गेलेत, यानंतर की त्यांना हिदायत स्पष्ट होऊन चुकली. [४] खचित्‌च शैतानाने त्यांच्याकरीतां(त्यांच्या कर्मांना) सुशोभित करून दिले आहे, आणि त्यांना ढिल देऊन ठेवली आहे. [५] (२५)**

ذَٰلِكَ بِأَنَّهُمْ قَالُوا لِلَّذِينَ كَرِهُوا مَا نَزَّلَ اللَّهُ سَنُطِيعُكُمْ فِي بَعْضِ الْأَمْرِ ۖ وَاللَّهُ يَعْلَمُ إِسْرَارَهُمْ ﴿٢٦﴾

**हे यासाठी [६] की, त्यांनी त्या लोकांशी, ज्यांनी अल्लाहच्या अवतरीत केलेल्या वह्याला वाईट समजले, हे म्हटले [७] की, आम्ही सुद्धा लवकरच काही कामांत [८] तुमचा कह्या मानू. आणि अल्लाह त्यांच्या गुप्त गोष्टी खूप (चांगल्या प्रकारे) जाणतो. [९] (२६)**

فَكَيْفَ إِذَا تَوَفَّتْهُمُ الْمَلَائِكَةُ يَضْرِبُونَ وُجُوهَهُمْ وَأَدْبَارَهُمْ ﴿٢٧﴾

**तर त्यांची कशी (दुर्गत) होईल, जेव्हा देवदूत त्यांचे प्राण हरण करतांना त्यांच्या चेहऱ्यावर आणि ढुंगणावर मारतील [१०] (२७)**

१) एक दुसऱ्याला ठार मारून. म्हणजे अखत्यार आणि पदाचा चुकीचा उपयोग करा. इमाम इब्ने कसीरने 'तवल्लयतुम्' चे भाषांतर केले आहे. ''तुम्ही जिहादकडून फिरून जा आणि त्याकडून तोंड फिरवा.'' म्हणजे तुम्ही पुन्हा अज्ञानकाळाकडे परतून जावे. आणि आपसांत रक्तपात आणि आप्तसंबंध तोडावेत. याच्यात मुलुखांत फिसाद करण्याची सर्वसाधारणपणे, आणि आप्तसंबंध तोडण्याची विशेषकरून मनाई, आणि मुलुखांत सुधारणा, आप्तसंबंध जोडण्याची ताकीद आहे. ज्याचा अर्थ आहे की नातेवाईकांशी जिभेने, कर्माने आणि द्रव्याच्या मार्फत चांगली वागणूक करा. हदीसींमध्ये सुद्धा याची फार ताकीद आणि महात्म्य आलेले आहे.

२) म्हणजे अशा लोकांच्या कानांना अल्लाहने (सत्य ऐकण्यापासून) बहिरे, आणि डोळ्यांना (सत्याला पाहण्यापासून) आंधळे केले आहे. हा त्यांच्या चर्चित कुकर्मांचा परिणाम आहे.

३) ज्यामुळे कुरआनाचे अर्थ आणि भावार्थ, त्यांच्या अंत:करणांत जात नाही.

४) याच्याने अभिप्रेत ढांभिकच आहेत. ज्यांनी जिहादपासून पळ काढून, कुफ्र आणि इस्लाम पासून फिरून जाण्याला जाहीर करून टाकले.

५) याचा फाईलपण शैतानच आहे. म्हणजे त्यांना मोठमोठ्या आकांक्षा आणि या फसगतीत व्यस्त करून दिले की, आतांतर तुमचे मोठे आयुष्य आहे, का लढाईत आपले प्राण गमवितांत? किंवा फाईल अल्लाह आहे. अल्लाहने त्यांना ढिल दिली; म्हणजे लगेच त्याची पकड केली नाही.

६) 'यह' ने अभिप्रेत त्यांचे इस्लामपासून फिरून जाणे आहे.

७) म्हणजे ढांभिकांनी, मुशरिकीन किंवा यहूद्यांना म्हटले.

८) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि आपण आणलेल्या धर्माच्या विरोधात.

९) जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''यांच्या रात्रीच्या गप्पा गोष्टी अल्लाहतआला लिहीत आहे.'' (सू.निसाअ-८१)

१०) ही काफिरांची त्या वेळची स्थिती वर्णन केली आहे, जेव्हा दूत त्यांचे प्राण हरण करतात. प्राण, दुतांपासून वांचण्याकरीता शरीराच्या आंत लपतात, आणि इकडे तिकडे पळतात. तेव्हा देवदूत सक्तीने आणि जोराने त्यांना पकडतात, ओढतात आणि मारतात. या पूर्वी हा विषय सू.अन्आम-९३ आणि सू.अन्फाल-५०, मध्ये सुद्धा येऊन चुकला आहे.

ذٰلِكَ بِاَنَّهُمُ اتَّبَعُوْا مَاۤ اَسْخَطَ اللّٰهَ وَكَرِهُوْا رِضْوَانَهٗ فَاَحْبَطَ اَعْمَالَهُمْ ﴿٢٨﴾

हे यासाठी की ते त्या मार्गावर चालले, ज्यामुळे त्यांनी अल्लाहला नाराज केले. आणि त्यांनी अल्लाहच्या प्रसन्नतेला वाईट जाणले. तर अल्लाहने त्यांची कर्मे अक्रित करून टाकली. (२८)

اَمْ حَسِبَ الَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ اَنْ لَّنْ يُّخْرِجَ اللّٰهُ اَضْغَانَهُمْ ﴿٢٩﴾

काय त्या लोकांनी ज्यांच्या मनांत रोग आहे, असे समजून ठेविले आहे की, अल्लाह त्यांच्या द्वेषाला उघडकीस आणणारच[१] नाही ? (२९)

وَلَوْ نَشَآءُ لَاَرَيْنٰكَهُمْ فَلَعَرَفْتَهُمْ بِسِيْمٰهُمْ ؕ وَلَتَعْرِفَنَّهُمْ فِيْ لَحْنِ الْقَوْلِ ؕ وَاللّٰهُ يَعْلَمُ اَعْمَالَكُمْ ﴿٣٠﴾

आणि जर आम्ही इच्छितो तर या सर्वांना तुला दाखवून देतो; तर तू त्यांना त्यांच्या चेहऱ्यानेच ओळखून[२] घेता. आणि खचित्‌च तू त्यांना त्यांच्या बोलण्याच्या छटेवरून ओळखून[३] घेशील; तुमची सर्व कामे अल्लाहला ठाऊक आहेत. (३०)

وَلَنَبْلُوَنَّكُمْ حَتّٰى نَعْلَمَ الْمُجٰهِدِيْنَ مِنْكُمْ وَالصّٰبِرِيْنَ ۙ وَنَبْلُوَا۟ اَخْبَارَكُمْ ﴿٣١﴾

खचित्‌च आम्ही तुमची परीक्षा घेऊन, तुमच्यातून जिहाद करणाऱ्यांना आणि सहनशिलता पत्करणाऱ्यांना आम्ही जाणून घेऊ. आणि आम्ही तुमचा अहवाल पण पडताळून पाहू.[४] (३१)

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَصَدُّوْا عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ وَشَآقُّوا الرَّسُوْلَ مِنْۢ بَعْدِ مَا تَبَيَّنَ لَهُمُ الْهُدٰى ۙ لَنْ يَّضُرُّوا اللّٰهَ شَيْـًٔا ؕ وَسَيُحْبِطُ اَعْمَالَهُمْ ﴿٣٢﴾

खचित्‌च ज्या लोकांनी कुफ्र केले आणि अल्लाहच्या मार्गाकडून लोकांना अडविले, आणि पैगंबरांचा विरोध केला, याच्यानंतर की, त्यांच्यासाठी धर्माचा सरळ मार्ग स्पष्ट होऊन गेला. ते मुळीच अल्लाहचे काही नुकसान करणार नाही.[५] लवकरच तो त्याची कर्मे अक्रित करून टाकेन.[६] (३२)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اَطِيْعُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوا الرَّسُوْلَ وَلَا تُبْطِلُوْۤا اَعْمَالَكُمْ ﴿٣٣﴾

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहचे आज्ञापालन करा आणि पैगंबराचा कह्या माना आणि आपल्या कर्मांना अक्रित करू नका.[७] (३३)

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَصَدُّوْا عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ ثُمَّ مَاتُوْا وَهُمْ كُفَّارٌ فَلَنْ يَّغْفِرَ اللّٰهُ لَهُمْ ﴿٣٤﴾

ज्या लोकांनी कुफ्र केले आणि अल्लाहच्या मार्गापासून इतरांना अडविले, मग कुफ्रच्या स्थितीतच मरण पावले; (लक्षांत ठेवा)! अल्लाह त्यांना मुळीच क्षमा करणार नाही. (३४)

فَلَا تَهِنُوْا وَتَدْعُوْۤا اِلَى السَّلْمِ ۖۗ وَاَنْتُمُ الْاَعْلَوْنَ ۖۗ وَاللّٰهُ مَعَكُمْ وَلَنْ يَّتِرَكُمْ اَعْمَالَكُمْ ﴿٣٥﴾

तर तुम्ही नेभळे बनून, समेटाकडे या परिस्थितीत उतरू नका. जेव्हाकी उच्च आणि वरचढ तुम्हीच राहाल.[८] आणि अल्लाह तुमच्या बरोबर[९] आहे. आणि तो तुमचे कर्मे कधीच अक्रित करणार नाही.[१०] (३५)

اِنَّمَا الْحَيٰوةُ الدُّنْيَا لَعِبٌ وَّلَهْوٌ ؕ وَاِنْ تُؤْمِنُوْا وَتَتَّقُوْا يُؤْتِكُمْ اُجُوْرَكُمْ وَلَا يَسْـَٔلْكُمْ اَمْوَالَكُمْ ﴿٣٦﴾

खरोखर हे इहलौकीक आयुष्य तर निव्वळ खेळ तमाशा आहे.[११] आणि जर तुम्ही विश्वास ठेवाल आणि (स्वत:ला) वाचवून चालाल, तर अल्लाह तुम्हास तुमची प्रतिफळे देईन. आणि तो तुमच्याजवळून तुमचे माल मागत नाही.[१२] (३६)

اِنْ يَّسْـَٔلْكُمُوْهَا فَيُحْفِكُمْ تَبْخَلُوْا وَيُخْرِجْ اَضْغَانَكُمْ ﴿٣٧﴾

जर तो तुम्हापासून तुमचे माल मागील आणि तुम्हास अगदीच निकड लावील, तर त्यावेळी कंजुषी करू लागाल. आणि तो कंजुषपणा तुमच्या द्वेषाला जाहीर करून टाकेन.[१३] (३७)

१) अजगान जिगनुनचे अनेकवचन आहे. ज्याचा अर्थ द्वेष, मत्सर आणि कपटाचा आहे. ढांभिकांच्या मनांत इस्लाम आणि मुसलमानांच्या विरुद्ध जो द्वेष आणि मत्सर होता, त्याच्या हवाल्याने सांगण्यांत येत आहे की काय हे समजतात की, अल्लाहतआला याला जाहीर करण्यास समर्थ नाही?

२) म्हणजे एक एक मनुष्याकडे असा अंगुलीनिर्देश करुन दिला असता की, प्रत्येक ढांभिकाला उघड्या डोळ्यांनी ओळखून घेतले जाते. तो सर्व साधारणपणे दोषांवर पडदा टाकत असतो, दोष जाहीर करीत नाही. दुसरे त्याने मनुष्यांच्या उघड गोष्टींवर फैसला करण्याचा आणि अंदरूनी गोष्टींचा मामला, अल्लाहच्या हवाली करण्याचा हुकूम

दिला आहे.

३) अलबत्ता त्यांच्या बोलण्याचा ढंगच असा असतो, जो यांच्या अंतरस्थः गोष्टींची चुगली करणारा असतो. ज्यामुळे हे पैगंबरा! तू त्यांना नक्कीच ओळखून घेशील, ही सर्वसाधारण अनुभवांत येणारी गोष्ट आहे. मनुष्याच्या मनांत जे काही असते, तो त्याला कितीका लपवेना! परंतु मनुष्याचे बोलणे, त्याच्या हालचारी संभाषणाच्या दर्म्यान थांबबणे, त्याचे विशेष रंग ढंग, त्याच्या मनांतील भेदांना जाहीर करुन देते.

४) अल्लाहतआलाच्या ज्ञानांत तर पहिलेच सर्व काही आहे. येथे ज्ञानाने अभिप्रेत घडून येणे आणि जाहीर होणे आहे, कारण की दुसऱ्यांनी पण जाणून घ्यावे. आणि पाहून घ्यावे. म्हणूनच इमाम इब्ने कसीरने याचा भावार्थ सांगितला आहे, 'आम्ही त्याच्या घडून येण्याला जाणून घ्यावे. इब्ने अब्बास ﷺ अशा प्रकारच्या शब्दांचे भाषांतर करीत असत, 'कारण की आम्ही पाहून घ्यावे.' (इब्ने कसीर)

५) किंबहुना आपलेच नुकसान करून घेतील.

६) कारण की ईमानाशिवाय कुठल्याही कर्माचे अल्लाहजवळ काही महत्त्व नाही. ईमान आणि निखालसताच प्रत्येक भल्या कर्माला या योग्य बनविते की, यावर अल्लाहजवळून मोबदला (पुण्यप्रतिफळ) मिळावा.

७) म्हणजे दांभिक आणि धर्माकडून फिरुन जाणाऱ्यांप्रमाणे, फिरुन जाणे, आणि दांभिकपणा अंगीकारून, आपल्या कर्मांना अक्रित करू नका. हा जणू इस्लामवर दृढ जमून राहण्याचा हुकूम आहे. काही मोठे गुन्हे आणि निर्लज्जपणाची कामे करण्याला सुद्धा, कर्मे अक्रित होण्याला कारणीभूत सांगितले आहे. म्हणूनच ईमानवाल्यांच्या वैशिष्ट्यांमधून एक वैशिष्ट हे पण सांगितले गेले आहे की, ते मोठे गुन्हे आणि निर्लज्जपणाच्या गोष्टीपासून वांचतात (सू.नज्म-३२) या अनुषंगाने मोठे गुन्हे आणि निर्लज्जपणापासून वांचण्याची याच्यांत ताकीद आहे. या महावाक्याने हे पण ठाऊक झाले की, कुठलेही कर्म मग ते कितीका उत्तम वाटेना, जर अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालनाच्या वर्तुळाबाहेर आहे, तर निरर्थक आणि बर्बाद आहे.

८) अर्थ हा आहे की, जेव्हा तुम्ही संख्याबळ आणि शक्ती सामर्थ्याच्या अनुषंगाने, शत्रुवर प्रबळ आणि श्रेष्ठत्व राखणारे आहांत, तर अशा स्वरुपांत काफिरांबरोबर समेट आणि दुर्बलतेचे प्रदर्शन करू नका. किंबहुना कुफ्रवर असा भारी प्रहार करा की, अल्लाहचा धर्म वरचढ होऊन जावा. प्रबळ आणि श्रेष्ठ असून सुद्धा, कुफ्रच्या बरोबर समेटाचा अर्थ, कुफ्रचे परिणाम वाढविण्यास मदत देण्यासारखे आहे. हा एक फार मोठा अपराध आहे. याचा हा अर्थ नाही की, काफिरांबरोबर समेट करण्याची परवानगी नाही. अशी परवानगी खचित्‌च आहे. परंतु नेहमीसाठी नाही. परिस्थितीच्या अनुशंगाने भलाईसाठी समेट करू शकतात. जसे स्वतः नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी मक्केच्या काफिरांशी दहा वर्षेपर्यंत युद्ध न करण्याचा करार केला होता.

९) याच्यांत मुसलमानांकरीता शत्रुंवर विजय आणि मदतीची मोठी शुभ सूचना आहे. ज्याच्याबरोबर अल्लाह आहे. त्याला कोणी हरवूं शकतो?

१०) किंबहुना तो याच्यावर पूर्ण मोबदला देईन. आणि याच्यांत काही कमी करणार नाही.

११) म्हणजे एक फसवणूक आणि धोका आहे. याला न काही आधार आहे न भक्कमपणा न याचा काही भरोसा.

१२) म्हणजे तो तुमच्या संपत्तीकडून निरपेक्ष आहे. म्हणूनच त्याने तुमच्याकडून जकातमध्ये सर्व संपत्तीची मागणी केली नाही. किंबहुना इच्या एका फारच अल्प हिश्श्याची म्हणजे फक्त अडीच टक्क्याची आणि ती सुद्धा एका वर्षानंतर, आपल्या आवश्यकतेपेक्षा जास्त असल्यास. याशिवाय त्याचा उद्देश्यसुद्धा, तुमच्या आपल्याच भाऊबंदाची मदत आणि भले इच्छिणे आहे. न की अल्लाह या संपत्तीतून आपल्या राज्याचे खर्च भागवतो.

१३) म्हणजे जर आवश्यकतेपेक्षा जास्त, सर्व संपत्तीची मागणी करेल ती पण आग्रहाने आणि जोर देऊन. तर हा मनुष्य स्वभाव आहे की तुम्ही कंजुषी पण कराल; आणि इस्लामच्या विरुद्ध आपल्या द्वेष आणि तिरस्काराचे प्रदर्शन सुद्धा. म्हणजे या स्वरूपांत, खुद्द इस्लामच्या विरुद्ध सुद्धा तुमच्या मनांत तिरस्कार निर्माण झाला असता की हा चांगला धर्म आहे, जो आमच्या कष्टाची सारी कमाई आपल्या पदरांत समाविष्ट करून घेऊ इच्छितो.

هٰٓاَنۡتُمۡ هٰٓؤُلَآءِ تُدۡعَوۡنَ لِتُنۡفِقُوۡا فِىۡ سَبِيۡلِ اللّٰهِ‌ۚ
فَمِنۡكُمۡ مَّنۡ يَّبۡخَلُ‌ۚ وَمَنۡ يَّبۡخَلۡ فَاِنَّمَا يَبۡخَلُ عَنۡ
نَّفۡسِهٖ‌ؕ وَاللّٰهُ الۡغَنِىُّ وَاَنۡتُمُ الۡفُقَرَآءُ‌ۚ وَاِنۡ تَتَوَلَّوۡا
يَسۡتَبۡدِلۡ قَوۡمًا غَيۡرَكُمۡ ۙ ثُمَّ لَا يَكُوۡنُوۡۤا
اَمۡثَالَـكُمۡ ﴿٣٨﴾ ع ١٠ ٨

खबरदार! तुम्ही ते लोक आहांत की, जेव्हा तुम्हास अल्लाहच्या मार्गांत खर्च करण्यासाठी बोलाविले जाते, [१] तेव्हा तुमच्यातून काही कंजुषपणा करू लागतात. आणि जो कंजुषपणा करीतो, तो तर वास्तविक आपल्याच जिवाशी कंजुषपणा करतो. [२] अल्लाहतआला (तर) निरपेक्ष आहे. आणि तुम्ही फकीर त्याचे (गरजवंत) आहांत. [३] आणि जर तुम्ही तोंड फिरवाल, [४] तर तो तुमच्या ऐवजी, दुसऱ्या लोकांस आणील. मग ते तुमच्या सारखे असणार नाही. [५] ३८ ४ ع १० ४

آياتها ٢٩ (٤٨) سُوۡرَةُ الۡفَتۡحِ مَدَنِيَّةٌ (١١١) رُكوعاتها ٤

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

## (४८) सू. अल-फत्ह

महावाक्ये २९ | रुकूअ ४

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِنَّا فَتَحۡنَا لَكَ فَتۡحًا مُّبِيۡنًا ۙ﴿١﴾

नि:संशय (हे पैगंबरा!) आम्ही आपणांस एक उघड विजय दिला आहे १

لِّيَغۡفِرَ لَكَ اللّٰهُ مَا تَقَدَّمَ مِنۡ ذَنۡۢبِكَ وَمَا تَاَخَّرَ وَيُتِمَّ
نِعۡمَتَهٗ عَلَيۡكَ وَيَهۡدِيَكَ صِرَاطًا مُّسۡتَقِيۡمًا ۙ﴿٢﴾

अशासाठी की, जे काही तुझे गुन्हे पूर्वी झाले आणि जे मागे राहिले, सर्वांना अल्लाहतआलाने क्षमा करून टाकावे. [६] आणि तुझ्यावर आपला उपकार पूर्ण करून टाकावा. [७] आणि तुला सरळ मार्गावर चालवावे. [८] २

وَّيَنۡصُرَكَ اللّٰهُ نَصۡرًا عَزِيۡزًا ﴿٣﴾

आणि अल्लाहने आपणांस जबरदस्त मदत करावी ३

هُوَ الَّذِىۡۤ اَنۡزَلَ السَّكِيۡنَةَ فِىۡ قُلُوۡبِ الۡمُؤۡمِنِيۡنَ
لِيَزۡدَادُوۡۤا اِيۡمَانًا مَّعَ اِيۡمَانِهِمۡ‌ؕ وَلِلّٰهِ جُنُوۡدُ السَّمٰوٰتِ
وَالۡاَرۡضِ‌ؕ وَكَانَ اللّٰهُ عَلِيۡمًا حَكِيۡمًا ۙ﴿٤﴾

तोच आहे ज्याने मुसलमानांच्या मनांत शांती (आणि संतोष) टाकून दिला; की आपल्या ईमानाबरोबर, ईमानांत आणखीपण वाढ व्हावी; [९] आणि आकाश आणि पृथ्वीचे सर्व (सैन्य) अल्लाहचेच आहे; [१०] आणि अल्लाहतआला जाणता आणि बुद्धीमान आहे. ४

لِّيُدۡخِلَ الۡمُؤۡمِنِيۡنَ وَالۡمُؤۡمِنٰتِ جَنّٰتٍ تَجۡرِىۡ
مِنۡ تَحۡتِهَا الۡاَنۡهٰرُ خٰلِدِيۡنَ فِيۡهَا وَيُكَفِّرَ عَنۡهُمۡ
سَيِّاٰتِهِمۡ‌ؕ وَكَانَ ذٰلِكَ عِنۡدَ اللّٰهِ فَوۡزًا عَظِيۡمًا ۙ﴿٥﴾

कर्मांचा परिणाम हा आहे की, ईमानवाले पुरुष आणि ईमानवाल्या स्त्रियां, यांना स्वर्गांत घेऊन जावे, [११] ज्याच्याखाली झरे वाहत आहेत, जेथे ते नेहमी राहतील, आणि त्यांच्यापासून त्यांचे अपराध दूर करून टाकावेत. आणि अल्लाहजवळ हे फार मोठे साफल्य मिळवून घेणे आहे. ५

१) म्हणजे काही भाग जकात म्हणून, आणि काही अल्लाहच्या मार्गात खर्च करा.

२) तथापि आपल्याच जिवाला, अल्लाहच्या मार्गात खर्च करण्याच्या मोबदल्यापासून वंचित् ठेवतो.

३) म्हणजे अल्लाह तुम्हास खर्च करण्याचे प्रोत्साहन यासाठी देत नाही की, तो तुमच्या संपत्तीचा गरजवंत आहे. नाही तो तर श्रीमंत आहे, निरपेक्ष आहे. तो तर तुमच्याच फायद्यासाठी, तुम्हास हा हुकूम देत आहे की, एकतर तुमच्या आपल्या जिवाची शुद्धी व्हावी. दुसरे, तुमच्या गरजवंताच्या इच्छा पूर्ण व्हाव्यात. तिसरे, तुम्ही शत्रूवर प्रबळ आणि उच्च रहावे. म्हणून अल्लाहच्या दया आणि मदतीचे तुम्ही गरजवंत आहांत, न की अल्लाह तुमचा गरजवंत आहे.

४) म्हणजे इस्लामकडून कुफ्रकडे फिरून जावे.

५) म्हणजे तुमच्यापेक्षा जास्त अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञाधारक आणि अल्लाहच्या मार्गांत खूप खर्च करणारे असतील. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला याबाबतीत विचारले गेले, तेव्हा आपण ﷺ नी हजरत सलमान फारसी رضي الله عنه च्या खांद्यावर हात ठेवून सांगितले, ''याच्याने अभिप्रेत हे आणि यांचे लोक आहेत. शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची, जिच्या हातांत माझे प्राण आहे, जर ईमान शुक्र ताऱ्या बरोबर जरी लटकलेले असते, तर त्याला फारसच्या काही लोकांनी प्राप्त करून घेतील.'' (तिर्मिझी)

✿ सहा हिजरीमध्ये, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि १४०० च्या जवळपास सहाबा (رضي الله عنهم) उमरा करण्याच्या नियतने, मक्केस गेलेत. परंतु मक्केच्या जवळ हुदैबिया मुक्कामी, काफिरांनी आपणांस अडविले. आणि

उमरा करू दिला नाही. आपण ﷺ नी हजरत उस्मान ؓ ला आपला प्रतिनीधी बनवून मक्केस पाठविले. कारण की त्यांनी कुरैशच्या सरदारांशी बोलणी करावीत. त्यांना मुसलमानांना उमरा करण्याची परवानगी देण्यांस राजी करावे. परंतु ह.उस्मान ؓ च्या मक्केत गेल्यानंतर, त्यांच्या हौतात्म्याची अफवा पसरून गेली. ज्यावर आपण (ﷺ) नी सहाबांकडून ह.उस्मान ؓ चा बदला घेण्याचे वचन (बैय्यत) घेतले. जे 'बैअत रिजवान' म्हणवले जाते. ही अफवा चुकीची निघाली; तथापि मक्केच्या काफिरांनी परवानगी दिली नाही. आणि मुसलमानांनी येत्या वर्षाच्या वायद्यावर, परत जाण्याचा विचार केला. तेथेच आपल्या डोक्यांचे मुंडन पण केले, आणि कुरबान्या केल्यांत. तसेच काफिरांबरोबर आणखीही काही गोष्टींचा करार झाला. ज्याला सहाबांपैकी बहुतेक नापसंद करीत होते. परंतु पैगंबर साहेबांच्या (ﷺ) दुरदृष्टीने याच्या दुरगामी परिणामांचा अंदाज घेत, काफिरांच्या अटींवरच समेटाला उत्तम जाणले. हुदैबियाहून मदीनेकडे येतांना, रस्त्यांत हा अध्याय प्रकट झाला. ज्यांत समेटाला मोठे यश म्हणून संबोधण्यांत आले. कारण की हा तह मक्केच्या विजयाची नांदी सिद्ध झाली. आणि याच्या दोन वर्षानंतरच मुसलमान मक्केत विजयी म्हणून दाखल झालेत. म्हणूनच काही सहाबा ؓ म्हणत असत, तुम्ही मक्केच्या विजयाला विजय म्हणतात, परंतु आम्ही हुदैबियाच्या समेटाला विजय म्हणून गणती करतो. आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी या अध्यायाच्या बाबतीत फर्माविले की, आजच्या रात्रीत माझ्यावर तो अध्याय प्रकट झाला आहे, जो मला हे जग आणि जे काही याच्यांत आहे, त्यापेक्षा जास्त मला प्रिय आहे. (स.बुखारी)

६) याच्याने अभिप्रेत तर्के अवलाच्या गोष्टी, किंवा ती कामे आहेत, जी आपण ﷺ नी आपल्या समजुतीने केलीत. परंतु अल्लाहने त्यांना नापसंत केले. जशी अब्दुल्लाह् बिन उम्मे मकतुम् वगैरे ची गोष्ट आहे; ज्यावर सू.अबसचे अवतरण झाले. या गोष्टी आणि कामे जरी गुन्हा नाही आणि आपण ﷺ गुन्ह्यापासून पवित्र होण्याच्या विरुद्ध नाही. परंतु आपल्या (ﷺ) उच्च शानला दृष्टीसमोर ठेवून, त्यांनापण कोताया गणले गेले. ज्यावर माफीची घोषणा केली जात आहे. 'लियग्फिर' मध्ये लाम लक्ष देण्यासाठी (तअ्लील) आहे. म्हणजे हा स्पष्ट विजय, त्या तीन गोष्टींचे सबब आहे, ज्या या महावाक्यांत सांगितल्या गेल्या आहेत. आणि हे क्षमादान गुन्ह्यामुळे आहे. या अनुषंगाने आहे की, या समेटानंतर, इस्लामला कबूल करणाऱ्यांच्या संख्येत खूपच वाढ झाली. ज्यामुळे आपल्या महान प्रतिफळांत पण खूप वाढ झाली आणि पुण्याची कामे, पापकर्मांचे प्रायश्चित आहेत.

७) त्या धर्माला वर्चस्व देऊन, ज्याचे तुम्ही आवाहन करीत आहात किंवा विजय आणि वर्चस्व बहाल करुन आणि काही म्हणतात की, माफी मागणे आणि हिदायत-सन्मार्गावर दृढ जमून रहाणे हेच देणग्यांचे पूर्ण होणे आहे. (फत्हुल कदीर)

८) म्हणजे यावर दृढ जमून रहाणे नशीबी यावे. हिदायतचे उच्चहून उच्च दर्जे बहाल करावेत.

९) म्हणजे त्या बेचैनी नंतर, जी समेटाच्या अटींमुळे मुसलमानांना झाली, अल्लाहतआलाने त्यांच्या अंतकरणांत शांती टाकून दिली, ज्यामुळे त्यांची मने समाधान पावली; आणि त्यांना मन:शांती लाभली आणि त्यांच्या ईमानांत आणखी वाढ झाली. हे महावाक्य पण या गोष्टीचे प्रमाण आहे की, ईमानामध्ये कमी जास्त होत असते.

१०) म्हणजे जर अल्लाहतआला इच्छील तर आपल्या कोण्या सैन्याने (उदा.देवदुतांनी) काफिरांना गारद करून टाकेल. परंतु त्याने आपल्या परीपक्व बुद्धीमत्तेमुळे असे केले नाही. आणि त्याच्या ऐवजी ईमानवाल्यांना धर्मयुद्धाचा हुकूम दिला. म्हणून पुढे आपले विशेषण जाणता आणि बुद्धीमान वर्णन केले आहे. किंवा अर्थ आहे की, आकाश आणि पृथ्वीचे देवदूत, आणि अशाच प्रकारे दुसरे सामर्थ्य आणि बलवान सैन्ये, सर्व अल्लाहच्या आज्ञांकित आहेत. आणि त्यांच्याकडून ज्या प्रकारे इच्छितो, काम करवून घेतो. काही वेळा तो एका काफिर समूहालाच, दुसऱ्या काफिर समूहावर लादून, मुसलमानांच्या मदतीचे स्वरुप निर्माण करुन देतो. उद्देश्य हा सांगणे आहे की, हे ईमानवाल्यांनो! अल्लाह तुमचा गरजवंत नाही; तो आपल्या पैगंबर आणि आपल्या धर्माच्या मदतीचे काम, कोण्याही समूह आणि सैन्याने घेऊ शकतो. (इब्ने कसीर आणि अयसरुत तफासीर)

११) हदीसमध्ये येते की, जेव्हा मुसलमानांनी सू.फतहचा सुरवातीचा भाग ऐकला ''लियगफिर लकल्लाहु'' तेव्हा त्यांनी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला म्हटले आपणांस मुबारक होवो! आमच्या करिता काय आहे? ज्यावर अल्लाहतआलाने महावाक्य 'लियुद्खिलल् मुअमिनीन' अवतरीत केले. (स.बुखारी)

وَّيُعَذِّبَ الْمُنٰفِقِيْنَ وَالْمُنٰفِقٰتِ وَالْمُشْرِكِيْنَ
وَالْمُشْرِكٰتِ الظَّآنِّيْنَ بِاللّٰهِ ظَنَّ السَّوْءِ ؕ عَلَيْهِمْ
دَآئِرَةُ السَّوْءِ ۚ وَغَضِبَ اللّٰهُ عَلَيْهِمْ وَلَعَنَهُمْ
وَاَعَدَّ لَهُمْ جَهَنَّمَ ؕ وَسَآءَتْ مَصِيْرًا ﴿٦﴾

आणि यासाठी की, दांभिक पुरुष आणि दांभिक स्त्रिया, आणि मुशरिक पुरुष आणि मुशरिक स्त्रिया, यांना शिक्षा द्यावी; जे अल्लाहतआलाशी वाईट ग्रह बाळगतात. [१] (वास्तविक) यांच्यावरच वाईटांचे परचक्र आहे; [२] अल्लाह त्यांच्यावर कोपायमान झाला. आणि त्यांना शापित केले आणि त्यांच्यासाठी नरकाग्नी तयार केला, आणि ते परतून जाण्याचे फारच वाईट ठिकाण आहे. (६)

وَلِلّٰهِ جُنُوْدُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ وَكَانَ اللّٰهُ
عَزِيْزًا حَكِيْمًا ﴿٧﴾

आणि अल्लाहतआलासाठीच आकाश आणि पृथ्वीचे सैन्य आहे. आणि अल्लाह परम समर्थ आणि बुद्धीमान आहे. [३] (७)

اِنَّآ اَرْسَلْنٰكَ شَاهِدًا وَّمُبَشِّرًا وَّنَذِيْرًا ﴿٨﴾

खचित्च आम्ही तुला सत्त्याला जाहीर करणारा, आणि शुभवर्तमान ऐकविणारा आणि भिवविणारा बनवून पाठविले आहे. (८)

لِّتُؤْمِنُوْا بِاللّٰهِ وَرَسُوْلِهٖ وَتُعَزِّرُوْهُ وَتُوَقِّرُوْهُ ؕ
وَتُسَبِّحُوْهُ بُكْرَةً وَّاَصِيْلًا ﴿٩﴾

यासाठी की, (अहो मुसलमानांनो)! तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान आणावे, आणि त्याची मदत करावी. आणि त्याचा आदर बाळगावा. आणि सकाळ सांज त्याचे पावित्र्य वर्णन करावे. (९)

اِنَّ الَّذِيْنَ يُبَايِعُوْنَكَ اِنَّمَا يُبَايِعُوْنَ اللّٰهَ ؕ يَدُ اللّٰهِ
فَوْقَ اَيْدِيْهِمْ ۚ فَمَنْ نَّكَثَ فَاِنَّمَا يَنْكُثُ
عَلٰى نَفْسِهٖ ۚ وَمَنْ اَوْفٰى بِمَا عٰهَدَ عَلَيْهُ اللّٰهَ
فَسَيُؤْتِيْهِ اَجْرًا عَظِيْمًا ﴿١٠﴾

जे लोक तुझ्याशी प्रतिज्ञा (बैअत) करीत आहेत, ते खचित्च अल्लाहशी प्रतिज्ञा करीत आहेत; [४] त्यांच्या हातावर अल्लाहचा हात आहे. [५] तर जो मनुष्य वचनभंग करील, तो आपल्या जिवाशीच वचनभंग करतो. [६] आणि जो मनुष्य या कराराला पूर्ण करेल, जो त्याने अल्लाहबरोबर केला आहे; [७] तर त्याला लवकरच अल्लाह फार मोठे पुण्यप्रतिफल देईल. (१०)

१) म्हणजे अल्लाहला त्याच्या हुकूमांवर वाईट आरोप लावतात. आणि रसूलुल्लाह् सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि सहाबा किराम ﷺ च्या बाबतीत कल्पना करतात की हे पराजीत किंवा ठार होऊन जातील. आणि इस्लाम धर्माचा शेवट होऊन जाईन. (इब्ने कसीर)

२) म्हणजे हे ज्या कालचक्र, शिक्षा, आणि गारद होण्याच्या बाबतीत मुसलमानांसाठी वाट पहात आहेत, ते तर यांच्याच नशीबी येणार आहे.

३) येथे याला दांभिक लोक आणि काफिरांच्या बाबतीत दुसऱ्यांदा सांगितले की, अल्लाहतआला आपल्या या शत्रुंना सर्व प्रकारे नष्ट करण्यास समर्थ आहे. ही वेगळी गोष्ट आहे की, तो आपल्या बुद्धी आणि मर्जीच्या अंतर्गत, यांना जेवढी इच्छेल, ढील देऊन देईल.

४) म्हणजे ही प्रतिज्ञा वास्तविक अल्लाहचीच आहे. कारण की त्यानेच जिहादचा हुकूम दिला आहे. आणि याच्यावर पुण्यप्रतिफल पण तोंच देणार आहे. जसे की दुसऱ्या ठिकाणी सांगितले की, ''हा आपले प्राण आणि धनाचा स्वर्गाच्या मोबदल्यात, अल्लाहबरोबर सौदा आहे.'' (सू.तौबा-१११) हे अशाच प्रकारे आहे, जसे, ''ज्याने रसूल (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) चे जो आज्ञापालन केले त्यानेच अल्लाहतआलाचे आज्ञापालन केले'' (सू.निसाअ-८०)

५) म्हणजे अल्लाह आपल्या ज्ञानामुळे सर्व ठिकाणी हजर आहे. त्यांच्या गोष्टी ऐकत आहे आणि त्यांची जागा पाहत आहे आणि त्यांचे उघड आणि गुप्त, त्याला ठाऊक आहे. महावाक्याने तेच 'बैअते रिजवान' अभिप्रेत आहे, जे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी ह.उस्मान ﷺ च्या हौतात्म्याची बातमी ऐकून, त्यांचा सूड उगविण्यासाठी हुदैबियामध्ये उपस्थित १४ किंवा १५ शे मुसलमानांकडून घेतले होते.

६) 'नकस' (वचनभंग) ने अभिप्रेत येथे बैअतचे तोडून टाकणे म्हणजे वचनाप्रमाणे युद्धांत भाग न घेणे आहे. म्हणजे जो मनुष्य असे करेल त्याचा दुष्परिणाम त्याच्यावरच पडेल.

७) की तो अल्लाहच्या पैगंबराची मदत करेल, त्यांच्या बरोबर होऊन लढेल, येथ पावेतो की, अल्लाहतआला मुसलमानांना विजय आणि वर्चस्व प्रदान करून देईल.

سَيَقُوْلُ لَكَ الْمُخَلَّفُوْنَ مِنَ الْاَعْرَابِ شَغَلَتْنَآ اَمْوَالُنَا وَ اَهْلُوْنَا فَاسْتَغْفِرْ لَنَا ۚ يَقُوْلُوْنَ بِاَلْسِنَتِهِمْ مَّا لَيْسَ فِيْ قُلُوْبِهِمْ ۚ قُلْ فَمَنْ يَّمْلِكُ لَكُمْ مِّنَ اللّٰهِ شَيْـًٔا اِنْ اَرَادَ بِكُمْ ضَرًّا اَوْ اَرَادَ بِكُمْ نَفْعًا ۚ بَلْ كَانَ اللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ خَبِيْرًا ⑪

**खेडूत लोक जे मागे सोडून दिले गेले होते, ते आता तुला म्हणतील की, आम्ही आपल्या माल आणि पोराबाळांत लागून राहून गेलो. तर आता तुम्ही आमच्या करिता क्षमायाचना करा.[१] हे लोक आपल्या जिव्हांनी ते सांगतात, जे यांच्या मनांत नाही.[२] आपण सांगून टाका की, तुमच्याकरीता अल्लाहकडून कोणत्याही गोष्टीचा अधिकार कोण बाळगतो ? जर तो तुम्हांस नुकसान पोहचवू इच्छिल[३] तर, किंवा तुम्हांस काही फायदा देऊं इच्छील[४] तर, किंबहुना तुम्ही जे काही करीत आहात, त्याला अल्लाह खूप चांगल्या प्रकारे जाणतो.[५] ११**

بَلْ ظَنَنْتُمْ اَنْ لَّنْ يَّنْقَلِبَ الرَّسُوْلُ وَ الْمُؤْمِنُوْنَ اِلٰٓى اَهْلِيْهِمْ اَبَدًا وَّ زُيِّنَ ذٰلِكَ فِيْ قُلُوْبِكُمْ وَ ظَنَنْتُمْ ظَنَّ السَّوْءِ ۚۖ وَ كُنْتُمْ قَوْمًا بُوْرًا ⑫

**(नाही), परंतु तुम्ही तर अशी कल्पना करुन ठेवली होती की, पैगंबर आणि मुसलमानांचे आपल्या घरांकडे परत फिरुन येणे मुळीच शक्य नाही. आणि हाच विचार तुमच्या अंत:करणात सुशोभित झाला होता. आणि तुम्ही वाईट कल्पना करुन ठेवली होती.[६] वास्तविक तुम्ही लोक आहातच हानी भोगणारे.[७] १२**

وَ مَنْ لَّمْ يُؤْمِنْ بِاللّٰهِ وَ رَسُوْلِهٖ فَاِنَّآ اَعْتَدْنَا لِلْكٰفِرِيْنَ سَعِيْرًا ⑬

**आणि जो मनुष्य अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणणार नाही, तर आम्ही सुद्धाअशा काफिरांकरीता धगधगीत अग्नी तयार करुन ठेवला आहे. १३**

१) याच्याने मदीनेच्या इर्दगिर्द वसलेल्या टोळ्या, गिफ्फार, मुजैना, अस्लम आणि दियल अभिप्रेत आहेत. जेव्हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी स्वप्न पाहिल्यानंतर (ज्याचा तपशील पुढे येईल.) उमऱ्या करिता मक्केला जाण्याची सार्वत्रिक दवंडी देऊन दिली. चर्चित टोळ्यांनी विचार केला की, सद्य: स्थिती तर मक्केला जाण्यासाठी योग्य नाही. तेथे अजून काफिरांचे वर्चस्व आहे, आणि मुसलमान दुर्बल आहेत. तसेच मुसलमान उमऱ्यांकरीता पूर्णपणे शस्त्रे घेऊन पण जाऊ शकत नाहीत. जर अशांत काफिरांनी मुसलमानांबरोबर लढण्याचा निर्णय करून घेतला, तर मुसलमान खाली हातांनी त्यांचा सामना कशा प्रकारे करतील? यावेळी मक्केला जाण्याचा अर्थ आपल्याला हानीत टाकणे आहे. म्हणून हे लोक आपण ﷺ बरोबर उमऱ्याकरीता गेले नाहीत. अल्लाहतआला यांच्या बाबतीत फर्मावित आहे की हे तुजजवळ कामांत व्यस्त असल्याची सबब पुढे करून क्षमायाचनेच्या विनविण्या करतील.

२) म्हणजे जिव्हांवर तर हे आहे की, आमच्या मागे आमच्या घरांची आणि आमच्या बायका पोरांची देखरेख करणारा कोणी नव्हता. म्हणून आम्हास स्वत:च थांबावे लागले. परंतु वास्तवतेत यांचे मागे रहाणे, दांभिकत्व आणि मृत्यूच्या भयामुळे होते.

३) म्हणजे जर अल्लाह तुमची संपत्ती नष्ट करण्याचा आणि तुमच्या घरवाल्यांना गारद करण्याचा फैसला करून टाकीन, तर काय कोणी तुमच्यातून अधिकार बाळगतो की त्याने अल्लाहला असे करू देऊ नये!

४) म्हणजे तुम्हास मदत पोहचविणे आणि तुम्हास गनीमतचा माल प्रदान करू इच्छेल, तर काणी रोकू शकतो? हे वास्तविक मागे राहून जाणाऱ्यांचे खंडन आहे. ज्यांनी ही कल्पना करून घेतली होती की ते जर नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बरोबर गेले नाहीत, तर नुकसानापासून सुरक्षित, आणि फायद्याने लाभान्वयीत होतील. वास्तविक नफा नुकसानीचा सर्व अधिकार, अल्लाहच्या हातात आहे.

५) म्हणजे तुम्हास तुमच्या कर्मांचा पूर्ण मोबदला देईल.

६) आणि तो हाच होता की, अल्लाह आपल्या पैगंबराची मदत करणार नाही. ही तीच पहली कल्पना आहे. पुनरावृत्ती ताकीद करण्यासाठी आहे.

७) 'बूर' 'बाईर' चे अनेकवचन आहे. नष्ट होणारा. म्हणजे हे ते लोक आहेत, ज्यांच्या दैवी नष्ट होणे आहे. जर इहलोकांत ते अल्लाहच्या शिक्षेपासून वांचून गेलेत, तर परलोकांत तर वांचून जाऊ शकत नाही. तेथे तर शिक्षा कुठल्याही स्वरुपांत भोगावीच लागेल.

وَلِلّٰهِ مُلۡكُ السَّمٰوٰتِ وَالۡاَرۡضِ ؕ يَغۡفِرُ لِمَنۡ يَّشَآءُ وَيُعَذِّبُ مَنۡ يَّشَآءُ ؕ وَكَانَ اللّٰهُ غَفُوۡرًا رَّحِيۡمًا ﴿۱۴﴾

**आणि पृथ्वी व आकाशाचे राज्य अल्लाहचेच आहे. ज्याला इच्छील क्षमा करील आणि ज्याला इच्छील त्याला शिक्षा देईल. आणि अल्लाह मोठा क्षमाकर्ता आणि दयाळू आहे.** (१) (१४)

سَيَقُوۡلُ الۡمُخَلَّفُوۡنَ اِذَا انْطَلَقۡتُمۡ اِلٰى مَغَانِمَ لِتَاۡخُذُوۡهَا ذَرُوۡنَا نَتَّبِعۡكُمۡ ۚ يُرِيۡدُوۡنَ اَنۡ يُّبَدِّلُوۡا كَلٰمَ اللّٰهِ ؕ قُلْ لَّنۡ تَتَّبِعُوۡنَا كَذٰلِكُمۡ قَالَ اللّٰهُ مِنۡ قَبۡلُ ۚ فَسَيَقُوۡلُوۡنَ بَلۡ تَحۡسُدُوۡنَنَا ؕ بَلۡ كَانُوۡا لَا يَفۡقَهُوۡنَ اِلَّا قَلِيۡلًا ﴿۱۵﴾

**जेव्हा तुम्ही गनीमतचा माल घेण्यासाठी जाऊ लागाल, तेव्हा लगेच हे लोक जे मागे राहून गेले होते, म्हणू लागतील की, आम्हास सुद्धा आपल्या बरोबर येण्याची परवानगी** (२) **देऊन द्या. ते इच्छितात की, अल्लाहच्या वाणीस बदलून टाकावे.** (३) **आपण सांगून द्या की, अल्लाहतआलाने पहिलेच सांगून दिले आहे की, तुम्ही मूळीच आमच्याबरोबर येणार नाही.** (४) **ते याचे उत्तर देतील की, (नाही! नाही!!) किंबहुना तुम्ही आमच्याशी मत्सर बाळगतात.** (५) **(खरी गोष्ट अशी आहे की), त्यांच्यात समज फारच कमी आहे.** (६) (१५)

قُلْ لِّلۡمُخَلَّفِيۡنَ مِنَ الۡاَعۡرَابِ سَتُدۡعَوۡنَ اِلٰى قَوۡمٍ اُولِىۡ بَاۡسٍ شَدِيۡدٍ تُقَاتِلُوۡنَهُمۡ اَوۡ يُسۡلِمُوۡنَ ۚ فَاِنۡ تُطِيۡعُوۡا يُؤۡتِكُمُ اللّٰهُ اَجۡرًا حَسَنًا ۚ وَاِنۡ تَتَوَلَّوۡا كَمَا تَوَلَّيۡتُمۡ مِّنۡ قَبۡلُ يُعَذِّبۡكُمۡ عَذَابًا اَلِيۡمًا ﴿۱۶﴾

**आपण मागे राहून गेलेल्या गावंढळ लोकांस सांगून द्या की, लवकरच तुम्ही एका सख्त लढवय्या लोकांकडे बोलाविले जाल, की तुम्ही त्यांच्याशी लढाल; किंवा ते मुसलमान होऊन जातील.** (७) **तर जर तुम्ही आज्ञापालन** (८) **केले, तर अल्लाह तुम्हास उत्कृष्ट बदला देईल.** (९) **आणि जर तुम्ही तोंड फिरविले, जसे की, याच्यापूर्वी तुम्ही तोंड फिरवून चूकला आहांत; तर तो तुम्हास दु:खदायक शिक्षा देईल.** (१०) (१६)

१) याच्यांत मागे राहून जाणाऱ्यांसाठी तौबा आणि अल्लाहकडे वळण्याचे प्रोत्साहन आहे. की जर ते दांभिकत्वापासून तौबा करतील, तर अल्लाहतआला त्यांना क्षमा करून टाकेन. तो फार क्षमाकर्ता आणि दयाळू आहे.

२) याच्यांत खैबरच्या युद्धांचा उल्लेख आहे. ज्याच्या विजयाची खुषखबर अल्लाहतआलाने हुदैबियांत दिली होती. तसेच अल्लाहतआलाने हे पण सांगितले होते की, येथून जितका सुद्धा गनीमतचा माल प्राप्त होईल, तो फक्त हुदैबियांत शामील होणाऱ्यांचा वाटा आहे. म्हणून हुदैबियाहून परतीनंतर, जेव्हा आपण ﷺ नी यहूद्यांच्या सतत वचन भंगामुळे, खैबरवर चढाईचा कार्यक्रम बनविला. तर चर्चित मागे रहाणाऱ्यांनी सुद्धा, निव्वळ गनीमतच्या मालाच्या प्राप्तीसाठी, बरोबर जाण्याचा इरादा जाहीर केला. ज्याला मान्य करण्यात आले नाही. महावाक्यांत मगानिमने अभिप्रेत खैबरचा माले गनीमतच आहे.

३) अल्लाहच्या या वाणीने अभिप्रेत अल्लाहच्या खैबरच्या गनीमतचा हुदैबियावाल्यांसाठी खास करण्याचा वायदा आहे. दांभिक याच्यांत शामील होऊन, अल्लाहची वाणी, म्हणजे वायद्याला बदलवू इच्छित होते.

४) हे 'नफी' नकाराच्या अर्थात आहे. म्हणजे तुम्हांस आमच्याबरोबर चालण्याची परवानगी नाही. अल्लाहतआलाचा हुकूम पण हाच आहे.

५) म्हणजे हे मागे राहून जाणारे म्हणतील की, तुम्ही आम्हास मत्सरामुळे, बरोबर घेऊन जाण्यांस टाळाटाळ करीत आहांत. कारण की गनीमतच्या मालांत आम्ही तुमचे भागीदार न व्हावे.

६) म्हणजे गोष्ट ही नाही, जसे ते समजत आहेत. किंबहुना ही बंदी त्यांच्या मागे राहून जाण्याच्या शिक्षेत आहे. परंतु खरी गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नाही.

७) या लढवय्या लोकांच्या बाबतीत मतभेद आहेत. काही भाष्यकार याच्याने अरबच्याच काही टोळ्या अभिप्रेत धरतात. उदाहरणार्थ हवाजिन किंवा सकीफ. ज्यांच्याशी हुनैन मुक्कामी मुसलमानांशी लढाई झाली. किंवा मुसैलमा कज्जाबचे लोक, बनू हनीफा. आणि काहींनी इराण आणि रोमचे अग्नीपूजक आणि ख्रिस्ती अभिप्रेत घेतले आहेत. या मागे राहून जाणाऱ्या गावंढळ लोकांना सांगण्यात येत आहे की, लवकरच एका लढवय्या लोकांबरोबर सामन्यांकरिता तुम्हास बोलाविण्यांत येईल. जर ते मुसलमान झाले नाही तर तुमची आणि त्यांची लढाई होईल.

८) म्हणजे प्रांजल मनाने मुसलमानांच्या बरोबर मिळून लढाल.

९) इहलोकांत गनीमतचा माल आणि परलोकांत मागील अपराधांची क्षमा आणि स्वर्ग.

१०) म्हणजे ज्याप्रमाणे हुदैबियाच्या प्रसंगी तुम्ही मुसलमानांबरोबर मक्केस जाण्यापासून पळ काढला होता. अशाच प्रकारे जर आतासुद्धा तुम्ही जिहादपासून पळ काढाल, तर मग अल्लाहची दु:खदायक शिक्षा तुमच्यासाठी तयार आहे.

لَيْسَ عَلَى الْأَعْمَىٰ حَرَجٌ وَلَا عَلَى الْأَعْرَجِ حَرَجٌ وَلَا
عَلَى الْمَرِيضِ حَرَجٌ ۗ وَمَن يُطِعِ اللَّهَ وَرَسُولَهُ
يُدْخِلْهُ جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۖ
وَمَن يَتَوَلَّ يُعَذِّبْهُ عَذَابًا أَلِيمًا ﴿١٧﴾

**आंधळ्यावर काही सक्ती (हरज) नाही, आणि न लंगड्यावर काही सक्ती आहे, आणि न कोण्या आजाऱ्यावर काही सक्ती आहे; (१) जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करेल, त्याला अल्लाहतआला अशा स्वर्गांत नेऊन दाखल करेल, ज्याच्या (झाडा) खाली झरे वाहत आहेत. आणि जो तोंड फिरवून घेईल, त्याला दु:खदायक शिक्षा देईल** (१७)

لَّقَدْ رَضِيَ اللَّهُ عَنِ الْمُؤْمِنِينَ إِذْ يُبَايِعُونَكَ
تَحْتَ الشَّجَرَةِ فَعَلِمَ مَا فِي قُلُوبِهِمْ فَأَنزَلَ
السَّكِينَةَ عَلَيْهِمْ وَأَثَابَهُمْ فَتْحًا قَرِيبًا ﴿١٨﴾

**खचित्‌च अल्लाहतआला ईमावाल्यांशी खूष होऊन गेला, जेव्हा की ते झाडाखाली तुझ्याबरोबर बैअत करीत होते. (२) यांच्या मनांत जे होते, त्याला त्याने जाणून घेतले (३) आणि त्यांना चित्त समाधान दिले. (४) आणि त्यांना जवळचा विजय दिला. (५)** (१८)

وَمَغَانِمَ كَثِيرَةً يَأْخُذُونَهَا ۗ وَكَانَ اللَّهُ عَزِيزًا
حَكِيمًا ﴿١٩﴾

**आणि विपूल गनीमतही जिला ते काबीज करतील, (६) आणि अल्लाह प्रबळ आणि बुद्धीमान आहे.** (१९)

وَعَدَكُمُ اللَّهُ مَغَانِمَ كَثِيرَةً تَأْخُذُونَهَا فَعَجَّلَ
لَكُمْ هَٰذِهِ وَكَفَّ أَيْدِيَ النَّاسِ عَنكُمْ وَلِتَكُونَ
آيَةً لِّلْمُؤْمِنِينَ وَيَهْدِيَكُمْ صِرَاطًا مُّسْتَقِيمًا ﴿٢٠﴾

**अल्लाहतआलाने तुमच्याशी विपूल गनीमतचा वायदा केला आहे, (७) जिला तुम्ही प्राप्त कराल. तर, ही तर तुम्हास लवकरच बहाल करुन दिली (८) आणि लोकांचे हात तुमच्यापासून आवरुन धरले. (९) यासाठी की ईमानवाल्यांकरिता हा एक नमुना व्हावा. (१०) आणि (यासाठी की), त्याने तुम्हांस सरळ मार्गावर चालवावे. (११)** (२०)

وَأُخْرَىٰ لَمْ تَقْدِرُوا عَلَيْهَا قَدْ أَحَاطَ اللَّهُ بِهَا ۚ
وَكَانَ اللَّهُ عَلَىٰ كُلِّ شَيْءٍ قَدِيرًا ﴿٢١﴾

**आणि तुम्हांस आणखी (गनीमतीपण) द्याव्यांत; ज्यावर तुम्ही अजून काबू केला नाही. अल्लाहतआलाने त्यांना आपल्या काबूत ठेवले (१२) आहे आणि अल्लाहतआला सामर्थ्यवान आहे.** (२१)

وَلَوْ قَاتَلَكُمُ الَّذِينَ كَفَرُوا لَوَلَّوُا الْأَدْبَارَ ثُمَّ لَا يَجِدُونَ
وَلِيًّا وَلَا نَصِيرًا ﴿٢٢﴾

**आणि जर काफिर तुमच्याशी युद्ध करते, तर अलबत्‌च पाठ दाखवून पळते मग न कोणी पुरस्कर्ता मिळाला असता न कोणी मददगार (१३)** (२२)

سُنَّةَ اللَّهِ الَّتِي قَدْ خَلَتْ مِن قَبْلُ ۖ وَلَن
تَجِدَ لِسُنَّةِ اللَّهِ تَبْدِيلًا ﴿٢٣﴾

**अल्लाहच्या या कायद्याप्रमाणे, जो पहिल्यापासून चालत आला आहे, (१४) तू कधीही अल्लाहतआलाच्या कायद्याला बदलणारा पावणार नाहीस** (२३)

وَهُوَ الَّذِي كَفَّ أَيْدِيَهُمْ عَنكُمْ وَأَيْدِيَكُمْ
عَنْهُم بِبَطْنِ مَكَّةَ مِن بَعْدِ أَنْ أَظْفَرَكُمْ
عَلَيْهِمْ ۚ وَكَانَ اللَّهُ بِمَا تَعْمَلُونَ بَصِيرًا ﴿٢٤﴾

**तोच आहे ज्याने खास मक्केमध्ये, काफिरांच्या हातांना तुमच्यापासून, आणि तुमच्या हातांना त्यांच्यापासून आवरून धरले. याच्यानंतर की त्याने तुम्हास त्यांच्यावर विजय दिला होता. (१५) आणि तुम्ही जे काही करीत आहांत, अल्लाहतआला त्याला पाहत आहे.** (२४)

१) दृष्टीपासून वंचिती आणि लंगडेपणामुळे, चालण्या फिरण्याची असमर्थतता. या दोन्ही सबबी तर ग्राह्य आहेत. या सबबीवाले किंवा यांच्या सारख्या अपंगांना, जिहादपासून वगळ्यात आले. हरजचा अर्थ गुन्ह्याचा आहे. यांच्याशिवाय जे आजारी आहेत, त्या तात्पुरत्या सबबी आहेत. जोपर्यंत ते खरोखर आजारी आहेत. जिहादमध्ये भाग घेण्यापासून ते वगळ्यांत आले आहे. आजार दूर होतांच, ते जिहादच्या हुकूमांत दुसऱ्या मुसलमानांबरोबर शामील होतील.

२) हे त्या बैअते रिजवानवाल्यांकरिता, अल्लाहची प्रसन्नता, आणि त्यांचे खरे खरे ईमानवाले होण्याचे सर्टिफिकेट आहे. ज्यांनी हुदैबियामध्ये एका झाडाखाली, या गोष्टीचा करार (प्रतिज्ञा) केला की, ते मक्केच्या कुरैशींबरोबर लढतील, आणि पळ काढणार नाही.

३) म्हणजे यांच्या अंत:करणात ज्या सत्य आणि पवित्रतेच्या भावना होत्या, अल्लाह त्या पण जाणतो. याच्याने सहाबांच्या शत्रुंचे खंडन होऊन गेले, जे म्हणतात की त्यांचे ईमान (फक्त) जाहिरी होते. मनाने ते दांभिक होते.

४) म्हणजे ते शस्त्राविना होते. युद्धाच्या इराद्याने गेले नव्हते. म्हणून लढाईची शस्त्रे जशी पाहिजे तशी नव्हती. असे असून सुद्धा, जेव्हा नबी ﷺ नी ह.उस्मान رضي الله عنه चा बदला घेण्याकरीता त्यांच्याकडून प्रतिज्ञा घेतली कुठलाही विचार न करता, सर्व

लढण्यासाठी तयार होऊन गेलेत. म्हणजे आम्ही मृत्यूचे भय त्यांच्या मनांतून काढून टाकले. आणि त्यांच्यासाठी सहनशिलता आणि चित्तसमाधान, त्यांच्यावर अवतरीत करून दिले. ज्यामुळे त्यांना लढण्याची हिंमत आली.

५) याच्याने अभिप्रेत तोच खैबरचा विजय आहे, जो यहुद्यांचा बाले किल्ला होता; आणि हुदैबियाहून परत आल्यानंतर मुसलमानांनी याला जिंकून घेतले.

६) हा तो माले गनीमत आहे, जो खैबर पासून प्राप्त झाला. हा फारच सुपिक आणि संपन्न इलाखा होता. याच हिशेबाने मुसलमानांना येथून फार मोठ्या प्रमाणांत गनीमतचा माल प्राप्त झाला. ज्याला फक्त हुदैबियावाल्यांमध्येच वाटून टाकण्यात आले.

७) ही दुसऱ्या विजयांच्या परिणामांत प्राप्त होणाऱ्या गनीमतच्या मालांची खुषखबर आहे, जी कयामतपर्यंत मुसलमानांना मिळणार आहे.

८) म्हणजे खैबरचा विजय किंवा हुदैबियाचा समेट. कारण की या दोन्ही गोष्टी मुसलमानांना तात्काळ प्राप्त होऊन गेल्यात.

९) हुदैबियामध्ये काफिरांचे हात आणि खैबरमध्ये यहूद्यांचे हात, अल्लाहने आवरुन घेतले. म्हणजे त्यांची हिंमत घालवून दिली. आणि ते मुसलमानांशी युद्धात व्यस्त झाले नाहीत.

१०) म्हणजे लोक या घटनेची चर्चा वांचून, अंदाज लावून घेतील की, अल्लाहतआला कमी संख्या असून सुद्धा मुसलमानांचा संरक्षक आणि शत्रुंवर त्यांना प्रबळ करणारा आहे. किंवा हे आवरुन धरणे सर्व वायदा केलेल्या गोष्टीत रसूलुल्लाह ﷺ च्या सत्यतेची निशाणी आहे.

११) म्हणजे सरळ मार्गावर दृढ जमवून द्यावे. किंवा या निशाणीने तुम्हांस सरळ मार्गावर आणखी जास्त दृढ जमवून द्यावे.

१२) हे नंतर होणारे विजय आणि त्यांच्यापासून प्राप्त होणारी गनीमत यांच्याकडे इशारा आहे. ज्याप्रमाणे चाऱ्ही भिंती बांधून कोण्या वस्तुला आपल्या कब्ज्यांत करुन घेण्यात येते आणि मग त्याच्याकडून बेफिकीर होऊन जाता येते. अशाच प्रकारे अल्लाहने या विजयांना आपल्या अधिकाराच्या चौकटीत घेऊन ठेवले आहे. म्हणजे जरी आता तुमच्या विजयाचे वर्तुळ, तेथपावेतो विस्तृत झालेले नाही. परंतु अल्लाहने त्या विजयांना तुमच्याकरीता आपल्या काबूत करुन ठेवले आहे; तो जेव्हा इच्छील, तुम्हास त्यांच्यावर वर्चस्व प्रदान करुन देईल. ज्याच्यांत काही संशय घेण्यासारखी गोष्ट नाही. कारण की तो सर्व सामर्थ्यवान आहे. काहींनी 'अहात' चा अर्थ ज्ञानाचा केला आहे. म्हणजे त्याला ठाऊक आहे की ते इलाखे सुद्धा तुम्ही काबिज करणार.

१३) हे हुदैबियामध्ये संभावित युद्धाच्या बाबतीत सांगण्यात येत आहे की, जर हे मक्केचे कुरैश समेट न करते, किंबहुना युद्धाचा मार्ग अनुसरते, तर ते पाठ फिरवून पळून गेले असते. कोणी त्यांचा मददगार झाला नसतां. अर्थ हा आहे की, आम्ही तेथे तुमची मदत केली असती आणि आमच्याशी सामना करण्याची कोणात ताकद आहे ?

१४) म्हणजे अल्लाहची ही पद्धत (सुन्नत) आणि सवय पूर्वीपासूनच चालत आली आहे की जेव्हा कुफ्र आणि ईमानच्या दर्म्यान, निर्णायक मोर्चे बांधणीचा प्रसंग येतो, तेव्हा अल्लाहतआला ईमानवाल्यांची मदत करून, सत्त्याला उंच स्थान बहाल करतो. जसे, अल्लाहच्या या पद्धती प्रमाणे बद्रमध्ये, तुमची मदत करण्यात आली.

१५) जेव्हा नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि सहाबा किराम ﵃ हुदैबियामध्ये होते, तेव्हा काफिरांनी ८० माणसे जी शस्त्र धारण केलेली होती, अशा इराद्याने पाठविली की, जर त्यांना संधी मिळेल तर फसवणुकीने नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि सहाबांच्या विरुद्ध कारवाई करावी. म्हणून हा शस्त्रसज्ज जथ्था, तनईमच्या पर्वताकडून हुदैबियामध्ये आला. ज्याचे ज्ञान मुसलमानांना सुद्धा होऊन गेले. आणि त्यांनी हिंमत करुन या सर्व लोकांना गिरफ्तार केले आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या समोर हजर केले. त्यांचा अपराध तर फारच मोठा होता. आणि त्यांना जी पण शिक्षा दिली जाती ती योग्य होती. परंतु याच्यांत धोका हा होता की, मग युद्ध अटळ होऊन गेले असते. जेव्हा नबी ﷺ, या प्रसंगी युद्धाच्या ऐवजी समेट इच्छित होते. कारण की याच्यांत मुसलमानांचा फायदा होता. म्हणून आपण ﷺ नी या सर्वांना क्षमा करुन सोडून दिले. (स.मुस्लिम) बतने मक्का ने अभिप्रेत हुदैबिया आहे. म्हणजे हुदैबिया मध्ये आम्ही तुम्हांस काफिरांपासून आणि काफिरांस तुमच्यापासून, लढण्यांस आवरले. हे अल्लाहने उपकार म्हणून याचा उल्लेख केला आहे.

هُمُ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَصَدُّوْكُمْ عَنِ الْمَسْجِدِ الْحَرَامِ وَالْهَدْيَ مَعْكُوْفًا اَنْ يَّبْلُغَ مَحِلَّهٗ ؕ وَلَوْلَا رِجَالٌ مُّؤْمِنُوْنَ وَنِسَآءٌ مُّؤْمِنٰتٌ لَّمْ تَعْلَمُوْهُمْ اَنْ تَطَـُٔوْهُمْ فَتُصِيْبَكُمْ مِّنْهُمْ مَّعَرَّةٌۢ بِغَيْرِ عِلْمٍ ۚ لِيُدْخِلَ اللّٰهُ فِيْ رَحْمَتِهٖ مَنْ يَّشَآءُ ۚ لَوْ تَزَيَّلُوْا لَعَذَّبْنَا الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْهُمْ عَذَابًا اَلِيْمًا ﴿٢٥﴾

**हेच ते लोक आहेत ज्यांनी कुफ्र केले आणि तुम्हास सन्माननीय मशीदीपासून अडविले; आणि कुरबानीच्या जनावरांवर, त्यांच्याजागी पोहोचण्यापासून (अडविले.) [१] आणि जर (पुष्कळसे) मुसलमान, पुरुष आणि (पुष्कळशा) मुसलमान स्त्रिया नसत्या, ज्यांची तुम्हाला काही खबर नव्हती [२] म्हणजे त्यांच्या पादाक्रांत होण्याची शंका नसती, ज्यावर त्यांच्यामुळे तुम्हांस सुद्धा अजाणतेपणा मुळे दु:ख पोहचते [३] (तर तुम्हांस लढण्याची परवानगी देऊन दिली गेली असती, [४] परंतु असे केले गेले नाही) कारण [५] की अल्लाहतआलाने आपल्या दयेत, ज्याला इच्छील त्याला दाखल करावे आणि जर हे, वेगळे वेगळे असते, तर याच्यांत जे काफिर होते आम्ही त्यांना दु:खदायक शिक्षा दिली असती [६] ㉕**

اِذْ جَعَلَ الَّذِيْنَ كَفَرُوْا فِيْ قُلُوْبِهِمُ الْحَمِيَّةَ حَمِيَّةَ الْجَاهِلِيَّةِ فَاَنْزَلَ اللّٰهُ سَكِيْنَتَهٗ عَلٰى رَسُوْلِهٖ وَعَلَى الْمُؤْمِنِيْنَ وَاَلْزَمَهُمْ كَلِمَةَ التَّقْوٰى وَكَانُوْٓا اَحَقَّ بِهَا وَاَهْلَهَا ؕ وَكَانَ اللّٰهُ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمًا ﴿٢٦﴾

ع ٣ / ٩ ||

**जेव्हां [७] की या काफिरांनी आपल्या मनांत आढ्यता धरली आणि आढ्यतापण, अज्ञानी सारखी. म्हणून अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराला आणि ईमानवाल्यांना आपल्याकडून चित्त समाधान दिले. [८] आणि अल्लाहतआलाने मुसलमानांना ईशभयावर दृढ जमवून ठेवले. आणि ते त्याच्या योग्यतेचे आणि जास्त पात्र पण आहेत; आणि अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीशी खूप वाकब आहे. ㉖**

१) हदी त्या पशुला म्हणण्यांत येते, जो हाजी किंवा उमरा करणारा आपल्या बरोबर मक्केला घेऊन जात असे. किंवा तेथूनच खरेदी करून जबह करत असे. 'महिल्ल' (हलाल होण्याची जागा) ने अभिप्रेत ती कुरबानी करण्याजी जागा आहे, जेथे त्यांना घेऊन जाऊन जबह केले जात असे. ही जागा उमरा करणाऱ्यांसाठी 'मर्वा' टेकडीच्या जवळ आणि हाजी करतां'मिना' होते, जे आता सुद्धा आहे. म्हणजे हे पशु या प्रतिक्षेत थांबलेले होते की मक्केत दाखल व्हावे की त्यांना तेथे कुरबान केले जावे. अर्थ हा आहे की, या काफिरांनीच तुम्हास सन्माननीय मशीदीपासून अडविले. आणि तुमच्याबरोबर जे पशु होते त्यांना पण आपल्या कुरबान करण्याच्या जागेपर्यंत पोहचू दिले नाही.

२) म्हणजे मक्केमध्ये आपले ईमान लपवून राहत होते.

३) काफिरांबरोबर लढाईच्या स्वरुपांत शक्य होते की, हे पण मारले जाते आणि तुम्हांस नुकसान झाले असते. 'मअर्रतून' चा खरा अर्थ दोषाचा आहे. येथे अभिप्रेत प्रायश्चित्त आणि तो वाईटपणा आणि ते लज्जास्पद होणे आहे, जे काफिरांकडून तुम्हास उचलावे लागते. म्हणजे एक तर चुकीच्या वधाचे प्राणमूल्य द्यावे लागते आणि दुसरे काफिरांचा हा टोमणा सहन करावा लागला असता की हे आपल्या मुसलमान साथीदारांनापण मारुन टाकतात.

४) म्हणजे जर अशी गोष्ट नसती, तर तुम्हांस मक्केमध्ये दाखल होण्याची, आणि मक्केच्या कुरैशीबरोबर लढण्याची परवानगी देऊन दिली गेली असती.

५) किंबहुना मक्केवाल्यांना अवकाश देऊन दिला गेला की, अल्लाह ज्याला इच्छील त्याला इस्लामला मान्य करण्याची सुबुद्धी देऊन देईल.

६) 'तजय्यलु' 'तमय्यजु' च्या अर्थांत आहे. अर्थ हा आहे की, मक्केमध्ये वसलेले मुसलमान जर काफिरांहून अलग रहाणारे असते, तर आम्ही तुम्हांस मक्केवाल्यांशी लढण्याची परवानगी देऊन दिली असती; आणि तुमच्या हातून त्यांना ठार करविले असते. आणि अशाप्रकारे आम्ही त्यांना दु:खदायक शिक्षा देतो. मोठ्या शिक्षेने अभिप्रेत येथे ठार करणे किंवा कैदी बनविणे, आणि प्रकोप आणि वर्चस्व आहे.

७) म्हणजे त्या वेळेची आठवण करा, जेव्हा की त्या काफिरांनी..........

८) काफिरांनी ही आढ्यता आणि गर्वाने अभिप्रेत, मक्कावाल्यांचे, मुसलमानांना मक्केत दाखल होण्यापासून अडविणे आहे. त्यांनी सांगितले की त्यांनी आमच्या मुलांना आणि वडीलांना ठार केले आहे. लात आणि उज्जाची शपथ ! आम्ही

त्यांना कधीच येथे प्रवेश करू देणार नाही. म्हणजे त्यांनी याला आपल्या प्रतिष्ठेची आणि मानमर्तब्याची बाब बनवून घेतली. यालाच अज्ञानकाळांतील आढ्यता म्हणण्यात आले आहे. कारण की खाना-ए-काबामध्ये उपासनेसाठी येण्यापासून अडविण्याचा कोणाला अधिकार नव्हता. मक्केच्या कुरैशच्या या शत्रुसारख्या वागणुकीच्या उत्तरांत धोका होता की, मुसलमानांच्या भावना देखील भडकून उठल्या असत्या; आणि ते सुद्धा याला आपल्या प्रतिष्ठेचा प्रश्न बनवून, मक्केला जाण्यावर आग्रह धरते; ज्यामुळे दोघांच्या दर्म्यान युद्ध छेडले जाते. आणि हे युद्ध मुसलमानांसाठी फारच धोकादायक राहिले असते. (जसा की पूर्वी इशारा केला जाऊन चुकला आहे.) म्हणून अल्लाहतआलाने मुसलमानांच्या अंत:करणांत चित्त समाधान अवतरीत करुन दिले. म्हणजे त्यांना सहनशिलता आणि सहन करण्याची सुबुद्धी देऊन दिली. आणि ते पैगंबरांच्या म्हणण्याप्रमाणे हुदैबियामध्येच थांबून राहिलेत. उत्साह आणि भावनेच्या भरांत, मक्केला जाण्याचा प्रयत्न केला नाही. काही म्हणतात की या अज्ञान कालीन आढ्यतेने, मक्केच्या कुरैशींची ती वागणूक आहे, जी समेटाकरिता आणि करारनाम्याच्या वेळी त्यांनी अंगीकारली होती. ही वागणूक आणि करारनामा, मुसलमानांकरीता, उघडपणे सहनशक्तीच्या पलीकडे होता. परंतु परिणामाच्या अनुषंगाने, कारण की याच्यांत इस्लाम आणि मुसलमानांचा उत्कृष्ट फायदा होता, म्हणून अल्लाहतआलाने मुसलमानांना फारच असह्यता आणि भारी वाटत असताना सुद्धा, त्याला मान्य करण्याची हिंमत बहाल करुन दिली. याचा संक्षिप्त खुलासा असा आहे की, जेव्हा रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी मक्केच्या कुरैशींच्या पांठविलेल्या प्रतिनिधींची ही गोष्ट मान्य करुन घेतली की, या वर्षी मुसलमान उमऱ्यांकरीता मक्केला जाणार नाहीत, आणि येथूनच परत जातील, तेव्हा मग आपण ﷺ नी ह.अली رضي الله عنه ला करारनामा लिहीण्याचा हुकूम दिला. त्यांनी आपल्या हुकुमाने बिस्‌मिल्लाह हिर्रमान् निर्रहीम लिहिले. काफिरांनी याच्यावर आक्षेप घेतला की, रहमान रहीमला आम्ही ओळखत नाही. आमच्याजवळ जो शब्द उपयोगांत आणला जातो म्हणजे बिस्मिका अल्लाहुम्मा (हे अल्लाह ! तुझ्या नांवाने) लिहावे. म्हणून आपण ﷺ नी अशाच प्रकारे लिहविले. मग आपण लिहविले, ''हा तो दस्तावेज आहे ज्यावर मुहम्मद रसूलुल्लाह (ﷺ) नी मक्केवाल्यांशी आपसात समेट केला आहे.'' कुरैशच्या प्रतिनिधींनी म्हटले, मतभेदाचा आधार तर आपली पैगंबरीच आहे. जर आम्ही आपणास अल्लाहचा पैगंबर मानून घेऊ, तर यानंतर भांडणच काय रहाते? मग आम्हास आपल्याशी लढण्याची आणि बैतुल्लामध्ये जाण्यापासून अडविण्याची आवश्यकताच काय आहे? आपण येथे 'मुहम्मद रसूलुल्लाह' च्या जागी 'मुहम्मद बिन अब्दुल्लाह्' लिहावे. म्हणून आपण ﷺ नी ह.अली رضي الله عنه ला, असेच लिहीण्याचा हुकूम दिला. (ही मुसलमानांकरीता फारच भडकविणारी परिस्थिती होती, जर अल्लाहतआला मुसलमानांवर मन:शांती अवतरीत न करतां, तर ते कधी याला सहन न करते) ह.अली (رضي الله عنه) नी आपल्या हाताने 'मुहम्मदुर् रसूलुल्लाह' चे शब्द मिटविण्याला आणि खोडण्याला नकार देऊन टाकला. ज्याला स्वत: नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी मिटविले. आणि त्याच्या जागी, मुहम्मद बिन अब्दुल्लाह् लिहीले, याच्यानंतर या करार नाम्यांत किंवा समेट पत्रांत तीन गोष्टी लिहील्या गेल्या. १) मक्केवाल्यांमधून जो मुसलमान होऊन आपल्याजवळ येईल, त्याला परत करून देण्यांत येईल. २) जो मुसलमान मक्केवाल्यांना जाऊन मिळेल, ते त्याला परत करण्याला बांधीलदार राहणार नाहीत. ३) मुसलमान येत्या वर्षी मक्केमध्ये येतील आणि येथे तीन दिवस मुक्काम करू शकतील. तथापि त्यांना शस्त्रे बरोबर आणण्याची परवानगी असणार नाही. (स.मुस्लीम) आणि याच्याबरोबर दोन गोष्टी आणखी लिहील्या गेल्या. १) या वर्षी लढाई तहकूब राहील (२) टोळ्यांमधून, (कबाईलमधून) ज्यांना पाहिजे त्यांनी मुसलमानांबरोबर आणि ज्यांना पाहिजे त्यांनी कुरैश बरोबर होऊन जावे.

१) याच्याने अभिप्रेत एकेश्वरवाद आणि पैगंबरीचा कलमा, लाइलाहा इल्लल्लाह मुहम्मदुर रसूलुल्लाह आहे. ज्याला हुदैबियाच्या दिवशी मुशरिक लोकांनी नाकारले. (इब्ने कसीर) किंवा ती सहनशिलता आणि धैर्य आहे ज्याचे प्रदर्शन त्यांनी हुदैबियामध्ये केले किंवा ते वचनाला जागणे आणि त्यावर भक्कम रहाणे आहे, जो ईशभयाचा परिणाम आहे. (फत्हुल कदीर)

لَقَدْ صَدَقَ اللّٰهُ رَسُوْلَهُ الرُّءْيَا بِالْحَقِّ لَتَدْخُلُنَّ
الْمَسْجِدَ الْحَرَامَ اِنْ شَآءَ اللّٰهُ اٰمِنِيْنَ مُحَلِّقِيْنَ
رُءُوْسَكُمْ وَ مُقَصِّرِيْنَ لَا تَخَافُوْنَ فَعَلِمَ مَا لَمْ
تَعْلَمُوْا فَجَعَلَ مِنْ دُوْنِ ذٰلِكَ فَتْحًا قَرِيْبًا ﴿٢٧﴾

**खचित्‌च अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराला वस्तुत: स्वप्न खरे दाखविले की, इन्शाअल्लाह तुम्ही खचित्‌च पूर्ण शांती आणि अभयासह मस्‌जिदे हराममध्ये दाखल व्हाल, डोकी मुंडवित आणि डोक्याचे केस कातरवत, [१] निर्भय होऊन आणि समाधानाने; तो त्या कामांना जाणतो, ज्यांना तुम्ही जाणत नाही. [२] तर त्याने याच्यापूर्वी एक जवळचा विजय तुम्हांस मिळवून दिला. [३] (२७)**

هُوَ الَّذِيْٓ اَرْسَلَ رَسُوْلَهُ بِالْهُدٰى وَدِيْنِ الْحَقِّ
لِيُظْهِرَهُ عَلَى الدِّيْنِ كُلِّهِ ۭ وَكَفٰى بِاللّٰهِ شَهِيْدًا ﴿٢٨﴾

**तोच आहे ज्याने आपल्या पैगंबराला हिदायत आणि सत्य धर्मासह पाठविले की, त्याला प्रत्येक धर्माच्या वर ठेवावे. [४] आणि अल्लाहतआला पुरेसा आहे सत्य जाहीर करण्याला. (२८)**

مُحَمَّدٌ رَّسُوْلُ اللّٰهِ ۭ وَالَّذِيْنَ مَعَهٗٓ اَشِدَّآءُ عَلَى
الْكُفَّارِ رُحَمَآءُ بَيْنَهُمْ تَرٰىهُمْ رُكَّعًا سُجَّدًا يَّبْتَغُوْنَ
فَضْلًا مِّنَ اللّٰهِ وَرِضْوَانًا ۡ سِيْمَاهُمْ فِيْ وُجُوْهِهِمْ
مِّنْ اَثَرِ السُّجُوْدِ ۭ ذٰلِكَ مَثَلُهُمْ فِي التَّوْرٰىةِ ۚ وَ
مَثَلُهُمْ فِي الْاِنْجِيْلِ ۚ كَزَرْعٍ اَخْرَجَ شَطْــَٔهٗ فَاٰزَرَهٗ
فَاسْتَغْلَظَ فَاسْتَوٰى عَلٰى سُوْقِهٖ يُعْجِبُ الزُّرَّاعَ
لِيَغِيْظَ بِهِمُ الْكُفَّارَ ۭ وَعَدَ اللّٰهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَ
عَمِلُوا الصّٰلِحٰتِ مِنْهُمْ مَّغْفِرَةً وَّاَجْرًا عَظِيْمًا ﴿٢٩﴾ ع ٤ ٣ ١٢

**मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) अल्लाहचे पैगंबर आहेत; आणि जे लोक त्यांच्या बरोबर आहेत, काफिरांवर फार सक्त आहेत, आपसांत करुणाशील आहेत. तू त्यांना पाहशील की, रुकूअ आणि सजदे करीत आहेत. अल्लाहतआलाची कृपा आणि प्रसन्नता संपादण्यात लागून आहेत. त्यांची खूण त्यांच्या चेहऱ्यावर सजद्यांच्या परिणामामुळे (घट्टे) आहेत. यांचे हेच वैशिष्ट्य, तौरातमध्ये आहेत; आणि त्यांचे वैशिष्ट्य. इंजीलमध्ये आहे. [५] त्या शेती सारखे, जिने आपला अंकुर काढला; [६] मग त्याला मजबूत केले, आणि तो मोठा होऊन गेला, मग आपल्या मुळांवर सरळ उभा होऊन गेला. आणि शेतकऱ्यांना आनंदित करू लागला; [७] की याच्यामुळे काफिरांना चिडवावे. [८] या ईमानवाल्यांना आणि चांगली कर्मे करणाऱ्यांना अल्लाहने क्षमा आणि मोठा मोबदला याचे अभिवचन दिले आहे. [९] (२९)** ع ४ ३ १२

اٰيَاتُهَا ١٨ ﴿٤٩﴾ سُوْرَةُ الْحُجُرٰتِ مَدَنِيَّةٌ ﴿١٠٦﴾ رُكُوْعَاتُهَا ٢

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

महावाक्ये १८ | **(४९)सू. अल–हुजुरात** | रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تُقَدِّمُوْا بَيْنَ يَدَيِ اللّٰهِ
وَ رَسُوْلِهٖ وَ اتَّقُوا اللّٰهَ ۭ اِنَّ اللّٰهَ سَمِيْعٌ عَلِيْمٌ ﴿١﴾

**हे ईमानवाल्या लोकांनो ! अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या पुढे जाऊ नका. [१०] आणि अल्लाहला भित रहा. खचित्‌च अल्लाहतआला ऐकणारा जाणणारा आहे. (१)**

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَرْفَعُوْٓا اَصْوَاتَكُمْ فَوْقَ
صَوْتِ النَّبِيِّ وَ لَا تَجْهَرُوْا لَهٗ بِالْقَوْلِ كَجَهْرِ
بَعْضِكُمْ لِبَعْضٍ اَنْ تَحْبَطَ اَعْمَالُكُمْ وَ اَنْتُمْ
لَا تَشْعُرُوْنَ ﴿٢﴾

**हे ईमानवाल्यांनो ! आपले आवाज पैगंबराच्या आवाजापेक्षा उंच करू नका आणि न त्यांच्याशी उंच आवाजांत बोला, जसे आपसांत एक दुसऱ्याशी करतात. कोठे (असे न व्हावे की), तुमची कर्मे अक्रित होऊन जावीत आणि तुम्हांस कळू सुद्धा नये [११] (२)**

१) हुदैबियाच्या घटनेपूर्वी, रसूलुल्ला ﷺ ला स्वप्नामध्ये मुसलमानांबरोबर बैतुल्लाहत प्रवेश करून, तवाफ आणि उमरा करताना दाखविले गेले. पैगंबराचे स्वप्न सुद्धा वह्यासारखेच असते. तथापि या स्वप्नांत हे निश्चित नव्हते की हे यावर्षी होईल. परंतु नबी ﷺ आणि मुसलमान, याला मोठी शुभसूचना समजून, उमऱ्यासाठी लगेच तयार होऊन गेलेत. आणि याच्याकरीता सार्वजनिक दवंडी पिटविली गेली आणि निघून पडले. सरशेवटी हुदैबियामध्ये तो समेट झाला, त्याचा तपशील आता येऊन चुकला. वास्तविक अल्लाहच्या ज्ञानांत या स्वप्नांचे भाकीत, येत्यावर्षी होते. जसे की येत्यावर्षी मुसलमानांनी फारच निर्भयतेसह हा उमरा केला आणि अल्लाहने आपल्या पैगंबराच्या स्वप्नाला खरे करुन दाखविले.

२) म्हणजे जर हुदैबिया मुक्कामी समेट झाला नसतां, तर युद्धामुळे, मक्केमध्ये स्थाईक दुर्बल मुसलमानांना नुकसान पोहचले असते. समेटाच्या या फायद्यांना अल्लाहच जाणतो.

३) याच्याने खैबरचा विजय आणि मक्केच्या विजयाशिवाय, समेटाच्या परिणामांत जे भरपूर मुसलमान झालेत, ते पण अभिप्रेत आहेत. कारण की हा पण विजयाचा एक मोठा प्रकार आहे. हुदैबियाच्या समेटाच्या वेळी मुसलमान दीड हजार होते. याच्या दोन वर्षानंतर, जेव्हा मुसलमान विजयी म्हणून मक्केत दाखल झालेत, तेव्हा त्यांची संख्या दहा हजार होती.

४) इस्लामचे हे वर्चस्व, दुसऱ्या धर्मावर, प्रमाणांच्या दृष्टीने, तर नेहमी शाबित झालेले आहे. तथापि ऐहिक आणि लष्करी दृष्ट्या सुद्धा पहिला कालखंड आणि त्याच्यानंतरचा एक दीर्घ मुदतीचा काळ, जो पर्यंत मुसलमान आपल्या धर्मावर कर्मरत राहिलेत, त्यांना वर्चस्व प्राप्त झाले. आणि आज सुद्धा हे स्वाभाविक वर्चस्व शक्य आहे, या अटीवर की, मुसलमानांनी मुसलमान होऊन जावे. तुम्हीच वरचढ राहाल, जर तुम्ही ईमानदार आहांत'' (सू.आले इमरान - १३९) हा धर्म प्रबळ होण्याकरतांच आलेला आहे. पराजित होण्याकरीता नाही.

५) इंजीलवर थांबण्याच्या स्वरुपांत हा अर्थ होईल की, यांच्या या खुब्या ज्या कुरआनांत सांगितल्या गेल्या आहेत, त्यांच्या या खुब्या तौरात आणि इंजीलमध्ये लिहलेल्या आहेतआणि पुढे 'कजरअिन्' मध्ये याच्यापूर्वी 'हुम्' महजूफ होईल आणि काही 'फित्तौरात' वर थांबतात म्हणजे त्यांची चर्चित खुबी तौरातमध्ये आहे आणि ''व मसलुहूम फिल् इंजील'' ला 'कजरअिन्' च्या बरोबर मिळवून घेतात. म्हणजे इंजील मध्ये यांची उपमा त्या शेतीसारखी आहे. (फत्हुल कदीर)

६) 'शत्अहू' ने रोपट्याचा तो पहिला अंकुर आहे, जो दाण्याला फाडून अल्लाहच्या सामर्थ्याने बाहेर निघतो.

७) ही सहाबा किराम ﷺ ची उपमा वर्णन केली गेली आहे. सुरवातीला ते फार थोडेसे होते, मग जास्त आणि मजबुत होऊन गेलेत. जशी शेती सुरवातीला दुर्बल असते; मग दिवसेंदिवस मजबुत होत जाते. येथपावेतो की, मजबुत खोडांवर कायम होऊन जाते.

८) किंवा काफिरांनी रागाने चिडून उठावे. म्हणजे सहाबा कराम ﷺ चा वाढता परिणाम आणि संख्याबळात वाढत जाणे, आणि त्यांची दिवसेंदिवस शक्ती व सामर्थ्यांत होणारी वाढ, काफिरांकरिता क्रोधायमान होण्याला कारणीभूत होती. यासाठी की याच्याने इस्लामचा घेरा पसरत होता, आणि कुफ्रचा घेरा आकुंचित होत होता. या महावाक्याने आधार घेत काही इमामांनी, सहाबा कराम बरोबर द्धेष आणि मत्सर बाळगणाऱ्यांना काफिर ठरविले आहे. याशिवाय दिशाहीन पंथाच्या दुसऱ्या धारणा, सुद्धा त्यांच्या कुफ्रवर प्रमाण करणाऱ्या आहेत.

९) या संपूर्ण महावाक्याचा एक एक भाग सहाबा किरामची महत्ता व श्रेष्ठत्व, पारलौकीक क्षमा आणि मोठे प्रतिफळ यांना स्पष्ट करणारा आहे. याच्यानंतर सुद्धा सहाबांच्या ईमानांत संशय घेणारा, मुसलमान होण्याचा दावा करील तर त्याला का म्हणून मुसलमानीच्या दाव्यांत खरा समजले जाऊ शकते?

✪ हा (दीर्घ तपशीलात) तिवाले मुफस्सल मधला पहिला अध्याय आहे. हुजरात पासून नाजिआत पर्यंतचे अध्याय, तिवाले मुफस्सल म्हणविली जातात. काहींनी सू.कॉफला पहिला अध्याय ठरविला आहे. (इब्ने कसीर आणि फत्हुल कदीर) यांना फज्रच्या नमाजीत पढणे, सुन्नत आणि आवडते (नबी सल्ल.चे) आहे. आणि सू.अबसपासून सू.शम्सपर्यंत, अवसात मुफस्सल, आणि सू.जुहा पासून वन्नास पर्यंत, किसारे मुफस्सल आहेत. जुहर आणि ईशामध्ये अवसात आणि मगरिब मध्ये किसार पढणे पसंत केले गेले आहे. (अयसरुत तफासीर)

१०) याचा अर्थ आहे की धर्माच्या बाबतीत, आपल्याकडून काही निर्णय करू नका; न आपल्या समजुतीला आणि मताला प्राधान्य द्या; किंबहुना अल्लाह आणि पैगंबराचे आज्ञापालन करा. आपल्याकडून धर्मांत वाढ किंवा बिदअतीचा शोध अल्लाह आणि पैगंबराच्या पुढे जाण्याचे अपवित्र साहस आहे. जे कोण्यापण ईमानवाल्याला लायक नाही. अशाच प्रकारे कोणी फतवा, कुरआन हदीसमध्ये, चिंतन व मनन केल्याशिवाय, दिला जाऊं नये. आणि दिल्यानंतर जर याचे स्पष्ट धर्म शास्त्राच्या विरुद्ध होणे जाहीर होऊन जाईल, तर याच्यावर आग्रह धरणे सुद्धां, या महावाक्यांत दिल्या गेलेल्या हुकुमाच्या विरुद्ध आहे. ईमानवाल्याची शान तर अल्लाह आणि पैगंबराच्या हुकुमांसमोर मान्य करणे आणि आज्ञापालनांत मस्तक वाकवून देणे आहे; न की, त्यांच्या मुकाबल्यांत, आपल्या गोष्टीवर किंवा कोण्या इमामच्या मतावर अडून राहणे.

११) याच्यात रसूलुल्लाहु ﷺ करीता, ते शिष्टाचार आणि मान सन्मान आणि प्रतिष्ठा व इज्जत करणे याचे वर्णन आहे, जे प्रत्येक मुसलमानाकडून वांच्छनीय आहे. पहिला शिष्टाचार हा आहे की, आपण ﷺ च्या उपस्थितीत जेव्हा तुम्ही आपसांत गोष्टी कराल, तेव्हा तुमचा आवाज, नबी ﷺ च्या आवाजापेक्षा मोठा नसावा. दुसरा शिष्टाचार, जेव्हा स्वत: नबी ﷺ शी बोलाल तर फारच नम्रतेने आणि थांबून थांबून बोला. अशाच प्रकारे मोठ्या मोठ्याआवाजांत बोलू नका; ज्याप्रमाणे तुम्ही आपसात कुठल्याही संकोचाशिवाय बोलतात. काहींनी म्हटले की, याचा अर्थ हा आहे की, हे मुहम्मद! हे अहमद ! म्हणू नका; किंबहुना शिष्टाचाराने या रसूलुल्लाह ! म्हणून संबोधित करा. जरा शिष्टाचार आणि मानसन्मानाच्या या तगाद्यांना तुम्ही पाळणार नाही, तर उद्धटपणाची शंका आहे. नकळत तुमची कर्मे अक्रित होऊं शकतात. या महावाक्याच्या अवतरण्याच्या कारणाकरीता पहा, स.बुखारी, तफसीर सू.हुजरात तथापि हुकूमाच्या अनुषंगाने हे सर्वांसाठी आहे.

إِنَّ الَّذِينَ يَغُضُّونَ أَصْوَاتَهُمْ عِندَ رَسُولِ اللَّهِ أُولَٰئِكَ الَّذِينَ امْتَحَنَ اللَّهُ قُلُوبَهُمْ لِلتَّقْوَىٰ ۚ لَهُم مَّغْفِرَةٌ وَأَجْرٌ عَظِيمٌ ۝٣

**नि:संशय जे लोक अल्लाहच्या पैगंबरासमक्ष आपले आवाज मंद करून घेतात, हेच ते लोक आहेत, ज्यांच्या अंत:करणांना अल्लाहने भयासाठी पडताळून घेतले आहे. यांच्याकरीता क्षमा आहे आणि मोठे प्रतिफळ आहे. (१) ३**

إِنَّ الَّذِينَ يُنَادُونَكَ مِن وَرَاءِ الْحُجُرَاتِ أَكْثَرُهُمْ لَا يَعْقِلُونَ ۝٤

**जे लोक आपणास आपल्या खोल्यांच्या बाहेरुन हाका मारतात, यांच्यातून बहुतेक काहीच समजत नाहीत. (२) ४**

وَلَوْ أَنَّهُمْ صَبَرُوا حَتَّىٰ تَخْرُجَ إِلَيْهِمْ لَكَانَ خَيْرًا لَّهُمْ ۚ وَاللَّهُ غَفُورٌ رَّحِيمٌ ۝٥

**जर हे लोक येथपर्यंत दम धरते की आपण स्वत:च यांचे जवळ येऊन जाते, तर हेच यांच्यासाठी उत्तम होते. (३) आणि अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (४) ५**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا إِن جَاءَكُمْ فَاسِقٌ بِنَبَإٍ فَتَبَيَّنُوا أَن تُصِيبُوا قَوْمًا بِجَهَالَةٍ فَتُصْبِحُوا عَلَىٰ مَا فَعَلْتُمْ نَادِمِينَ ۝٦

**अहो मुसलमानांनो! जर तुम्हास कोणी दुष्ट काही बातमी देईल तर तुम्ही तिची चांगल्या प्रकारे चौकशी करून घेत जा. (५) असे न व्हावे की, अज्ञानामुळे कोण्या समूहाला तुम्ही इजा पोहचवून द्यावी; मग आपल्या केल्यावर पश्चात्ताप करावा. ६**

وَاعْلَمُوا أَنَّ فِيكُمْ رَسُولَ اللَّهِ ۚ لَوْ يُطِيعُكُمْ فِي كَثِيرٍ مِّنَ الْأَمْرِ لَعَنِتُّمْ وَلَٰكِنَّ اللَّهَ حَبَّبَ إِلَيْكُمُ الْإِيمَانَ وَزَيَّنَهُ فِي قُلُوبِكُمْ وَكَرَّهَ إِلَيْكُمُ الْكُفْرَ وَالْفُسُوقَ وَالْعِصْيَانَ ۚ أُولَٰئِكَ هُمُ الرَّاشِدُونَ ۝٧

**आणि तुम्ही जाणून असा की, तुमच्यांत अल्लाहचे पैगंबर उपस्थित आहेत. (६) जर ते बहुतेक मामल्यात तुमचा कह्या मानीत जातील तर तुम्हीच कष्टांत पडून जाल. परंतु अल्लाहतआलाने तुम्हास ईमानप्रिय करून दिले आहे. आणि त्याला तुमच्या अंत:करणांत सुशोभित करून दिले आहे. आणि कुफ्रला आणि कुकृत्याला आणि आज्ञाभंगाला तुमच्या दृष्टीत तिरस्करणीय बनवून दिले आहे. हेच लोक सन्मार्गोन्मुख आहेत ७**

فَضْلًا مِّنَ اللَّهِ وَنِعْمَةً ۚ وَاللَّهُ عَلِيمٌ حَكِيمٌ ۝٨

**अल्लाहचा उपकार आणि ईनाम (७) आहे; आणि अल्लाह (सर्व) ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. ८**

१) यांत त्या लोकांची प्रसंशा आहे, जे रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या मोठेपणाचा आणि दबदब्याचा विचार करुन, आपले आवाज मंद ठेवतात.

२) हे महावाक्य बनु तमीमच्या काही गावंढळ लोकांच्या बाबतीत अवतरीत झाले. ज्यांनी एका दिवशी, दुपारच्या वेळी जी की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या वामकुक्षीची वेळ होती; खोलीच्या बाहेर उभे राहून, गावंढळ पणाने हे मुहम्मद ! हे मुहम्मद !! असा पुकारा केला की आपण ﷺ नी बाहेर यावे. (मुसनद अहमद ४८८/३-३९४/६) अल्लाहतआलाने फर्माविले यांच्यातील बहुतेक लोक अक्कल बाळगत नाही. याचा अर्थ हा झाला की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या दबदब्याची शान, आणि आपल्या आदर सन्मानाच्या तगाद्यांकडे लक्ष न देणे हा मूर्खपणा आहे.

३) म्हणजे आपल्या बाहेर येण्याची वाट पाहाते; आणि आपल्याला बोलाविण्यांत घाई न करते. तर धर्म आणि इहलोक, दोघांच्या दृष्टीने उत्तम होते.

४) म्हणून पकड केली नाही. परंतु पुढच्या वेळेसाठी, शिष्टाचार आणि आदर सन्मानची ताकीद दिली.

५) याच्यांत एक फारच महत्त्वाचे तत्त्व सांगितले गेले आहे, ज्याचे वैयक्तिक आणि सामुहिक, दोन्ही स्तरांवर फार महत्त्व आहे. प्रत्येक व्यक्ती आणि प्रत्येक सत्तेची ही जबाबदारी आहे की, त्यांच्याजवळ जी पण बातमी किंवा सूचना येईल विशेषत: कुकृत्य करणारे, आज्ञाभंजक आणि फिसादी, प्रकारच्या लोकांकडून तर पहिले इची चौकशी केली जावी. कारण की चुकीच्या समजुतीने कोणाच्या विरुद्ध कोणी कारवाई न केली जावी.

६) ज्याचा तगादा हा आहे की, त्यांचा आदर आणि आज्ञापालन करा. यासाठी की, ते तुमच्या भलाया कशात आहे हे फार चांगल्या प्रकारे जाणतात. कारण त्यांच्यावर वह्य अवतरीत होते. तर तुम्ही त्यांच्या मागे चला. त्यांना आपल्या मागे चालविण्याचा प्रयत्न करू नका. यासाठी की ते जर तुमच्या आवडीच्या गोष्टी मानणे सुरू करुन देतील, तर याच्याने तुम्ही स्वत:च कष्टांत पडून जाल. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''जर सत्त्यच यांच्या मनेच्छेचे अनुकरण करणारे होऊन जाईल, तर पृथ्वी आणि आकाश, आणि यांच्या दर्म्यानची प्रत्येक वस्तू छिन्न विछिन्न होऊन जाईल'' (सू.मोमिनून-७१)

७) हे महावाक्य सुद्धा सहाबा किरामचे श्रेष्ठत्व, त्यांचे ईमान आणि त्यांच्या सन्मार्गोन्मुख होण्याचे स्पष्ट प्रमाण आहे. व लवकरिहल काफिरून.

وَاِنْ طَآئِفَتٰنِ مِنَ الْمُؤْمِنِيْنَ اقْتَتَلُوْا فَاَصْلِحُوْا
بَيْنَهُمَا ۚ فَاِنْۢ بَغَتْ اِحْدٰىهُمَا عَلَى الْاُخْرٰى
فَقَاتِلُوا الَّتِيْ تَبْغِيْ حَتّٰى تَفِيْٓءَ اِلٰٓى اَمْرِ اللّٰهِ ۚ فَاِنْ
فَآءَتْ فَاَصْلِحُوْا بَيْنَهُمَا بِالْعَدْلِ وَاَقْسِطُوْا ؕ
اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الْمُقْسِطِيْنَ ﴿٩﴾

आणि जर मुसलमानांचे दोन पक्ष आपसांत लढतील, तर त्यांच्यात समेट करुन देत जा. (१) मग जर त्या उभयंतातून एक, दुसऱ्या पक्षावर अत्त्याचार करील, तर तुम्ही (सर्व) त्या पक्षांशी, जो अत्त्याचार करतो, लढा. येथपावेतो की, तो अल्लाहच्या हुकूमाकडे वळेल. (२) जर (तो अल्लाहकडे) वळेल, तर मग त्या न्यायाने समेट करवून द्या. आणि न्याय करा. (३) नि:संशय अल्लाहतआला न्यायाने वर्तणाऱ्यास प्रिय ठेवतो. (४) ९

اِنَّمَا الْمُؤْمِنُوْنَ اِخْوَةٌ فَاَصْلِحُوْا بَيْنَ اَخَوَيْكُمْ ۚ
وَاتَّقُوا اللّٰهَ لَعَلَّكُمْ تُرْحَمُوْنَ ﴿١٠﴾

(लक्षांत असू द्या) सर्व मुसलमान आपसांत भाऊ भाऊ आहेत. तर आपल्या दोन भावांत समेट करुन देत चला. (५) आणि अल्लाहला भित रहा की, तुमच्यावर दया केली जावी. (६) १०

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا يَسْخَرْ قَوْمٌ مِّنْ قَوْمٍ عَسٰٓى
اَنْ يَّكُوْنُوْا خَيْرًا مِّنْهُمْ وَلَا نِسَآءٌ مِّنْ نِّسَآءٍ
عَسٰٓى اَنْ يَّكُنَّ خَيْرًا مِّنْهُنَّ ۚ وَلَا تَلْمِزُوْٓا اَنْفُسَكُمْ
وَلَا تَنَابَزُوْا بِالْاَلْقَابِ ؕ بِئْسَ الِاسْمُ الْفُسُوْقُ
بَعْدَ الْاِيْمَانِ ۚ وَمَنْ لَّمْ يَتُبْ فَاُولٰٓئِكَ هُمُ
الظّٰلِمُوْنَ ﴿١١﴾

हे ईमानवाल्यांनो! कोण्या समूहाने, कोण्या समूहावर हसू नये. शक्य आहे की हा त्याच्या पेक्षा उत्तम असेल. न स्त्रियांनी स्त्रियांवर (हंसावे) शक्य आहे की त्या यांच्यापेक्षाही उत्तम असतील (७) आणि आपसांत एक दुसऱ्याला टोमणे मारू नका (८) आणि न कोणास वाईट नांवे ठेवा. (९) ईमान (आणल्या) नंतर कुकृत्याचे नावच वाईट आहे (१०) आणि जे (अशा गोष्टीपासून) तौबा करणार नाहीत तेच जुलुमी लोक आहेत ११

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اجْتَنِبُوْا كَثِيْرًا مِّنَ الظَّنِّ ؗ
اِنَّ بَعْضَ الظَّنِّ اِثْمٌ وَّلَا تَجَسَّسُوْا وَلَا يَغْتَبْ
بَّعْضُكُمْ بَعْضًا ؕ اَيُحِبُّ اَحَدُكُمْ اَنْ يَّاْكُلَ لَحْمَ
اَخِيْهِ مَيْتًا فَكَرِهْتُمُوْهُ ؕ وَاتَّقُوا اللّٰهَ ؕ اِنَّ
اللّٰهَ تَوَّابٌ رَّحِيْمٌ ﴿١٢﴾

हे ईमानवाल्यांनो! फार तर्क (गुमान) करण्यापासून वाचा; कारण की, काही तर्क पाप आहेत. (११) आणि (एक दुसऱ्यांच्या) भेदांची चौकशी करीत राहू नका. (१२) आणि न तुमच्यातून कोणी, कोणाची निंदा करावी. (१३) काय तुमच्यातून कोणी सुद्धा, आपल्या मृत भावाचे मांस खाणे पसंत करील? तुम्हास तर यापासून किळस येईल; (१४) आणि अल्लाहला भीत रहा; नि:संशय अल्लाह (मोठाच) पश्चात्ताप मान्यकर्ता आणि दयाळू आहे. १२

१) आणि ही समेटाची पद्धत ही आहे की, त्यांना कुरआन व हदीसकडे बोलाविले जावे. म्हणजे त्यांच्या प्रकाशांत त्यांच्या समस्यांचे निराकरण केले जावे.

२) म्हणजे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशांप्रमाणे आपला मतभेद दूर करण्यांस तयार झाले नाहीत, किंबहुना बंडखोरीचा मार्ग अनुसरतील, तर दुसऱ्या मुसलमानांची जबाबदारी आहे की, त्यांनी सर्व मिळून बंडखोरी करणाऱ्या गटाशी लढाई करावी. येथेपावेतो की, त्यांनी अल्लाहचा हुकूम मानण्यांस तयार होऊन जावे.

३) म्हणजे बंडखोर गट, बंडखोरीपासून माघार घेऊन घेईल, तेव्हा मग न्यायाने, म्हणजे कुरआन व हदीसच्या प्रकाशांत दोन्ही पक्षांत समेट करून दिला जावा.

४) प्रत्येक मामल्यांत न्याय करा यासाठी की, अल्लाहतआला न्याय करणाऱ्यांस पसंत करतो आणि त्याची ही पसंती या गोष्टीला आवश्यक आहे की त्याने न्याय करणाऱ्यांना उत्कृष्ट मोबदला बहाल करावा.

५) हे मागच्या हुकूमाचेच समर्थन आहे. म्हणजे जेव्हा सर्व ईमानवाले आपसांत भाऊ भाऊ आहेत, तर त्या सर्वांचे मूळ ईमान झाले. म्हणून या मुळाच्या महत्त्वाचा तगादा आहे की एकाच धर्मावर ईमान ठेवणारे यांनी आपसांत लढू नये. किंबहुना एक दुसऱ्याचे मददगार व पुरस्कर्ते, सहानुभूती बाळगणारे व दु:खांत सहभागी होणारे, आणि साथ देणारे व भले इच्छणारे होऊन रहावे. आणि कधी चुकीच्या समजुतीने यांच्या दर्म्यान द्वेष आणि तिरस्कार निर्माण होऊन गेला, तर त्याला दूर करुन त्यांना आपसांत पुन्हा दुसऱ्यांदा जोडून दिले जावे. (आणखी पहावे सू. तौबा आ.७१ चा समास दहावा पारा)

६) आणि प्रत्येक मामल्यांत अल्लाहला भ्या. कदाचित यामुळे तुम्ही अल्लाहच्या दयेला पात्र ठरून जावेत. नाही तर अल्लाहची दया तर, ईमान आणि ईशभयवाल्यांकरीता निश्चित्च आहे. या महावाक्यांत बंडखोर पक्षाबरोबर लढाई करण्याचा हुकूम आहे. वास्तविक हदीसमध्ये मुसलमानांशी लढाईला कुफ्र म्हणण्यात आले आहे. तर हे कुफ्र त्यावेळी होईल, जेव्हा काही कारण नसतांना मुसलमानांशी लढाई केली जाईल. परंतु या लढाईचा पाया जर बंडखोरी आहे, तर

ही लढाई न फक्त योग्य आहे किंबहुना याचा हुकूम दिला गेला आहे. जो ताकीद वर प्रमाणित आहे. अशाच प्रकारे बंडखोर गटाला कुरआनाने ईमानवालाच ठरविले. ज्याचा अर्थ हा आहे की, फक्त बंडखोरीने जो कबीरा गुन्हा (मोठे पातक) आहे; तो गट ईमानापासून निष्कासित होणार नाही. जसे की, खवारिज आणि काही मुअतजिलांची धारणा आहे की, मोठे गुन्हे करणारा ईमानापासून निष्कासीत होऊन जातो. आता काही फारच महत्त्वाच्या चारित्र्यविषयक सूचना मुसलमानांना देण्यांत येत आहे.

७) एक मनुष्य दुसऱ्या कोण्या मनुष्यांची थट्टा, म्हणजे त्याची हंशी उडविणे, त्याचवेळी करतो; जेव्हा तो आपल्याला त्याच्या पेक्षा उत्तम आणि त्याला आपल्यापेक्षा क्षुल्लक आणि कनिष्ठ समजतो. वास्तविक अल्लाहजवळ ईमान आणि कर्माच्या अनुषंगाने कोण उत्तम आहे आणि कोण नाही, हे फक्त अल्लाहलाच ठाऊक आहे. म्हणून आपल्याला उत्तम आणि दुसऱ्याला कमी समजण्याचे काही कारणच नाही. म्हणून या महावाक्यामध्ये यापासून मना करण्यांत आले आहे. आणि असे म्हणतात की, स्त्रियांमध्ये हा चारित्र्य विषयक रोग जास्त असतो. म्हणून स्त्रियांचा वेगळा उल्लेख करुन त्यांना सुद्धा विशेष, यापासून मना करण्यांत आले आहे. आणि पैगंबरांच्या हदीसमध्ये लोकांना क्षुल्लक समजणे, गर्व संबोधण्यांत आले आहे. 'अल्‌किबरु बतरल हक्की व गम्तुन् नासी' (अबुदाऊद) आणि गर्व अल्लाहला फारच नापसंत आहे.

८) म्हणजे एक दुसऱ्याला टोमणे मारू नका. उदाहरणार्थ तू तर अमक्याचा मुलगा आहे. तुझी आई अशी तशी आहे. तू अमक्या घराण्याचा आहेस ना! वगैरे.

९) म्हणजे आपल्याकडून, थट्टा आणि कमी लेखण्यासाठी, लोकांची अशी नावे ठेऊन घ्यावीत, जी त्यांना नापसंत आहेत. किंवा चांगल्या चुंगल्या नावांना बिघडवून बोलणे हे वाईट नावांनी बोलाविणे आहे, ज्याला येथे मना करण्यात आले आहे.

१०) म्हणजे अशा प्रकारे नांव बिघडवून किंवा वाईट नांवे उपयोगांत आणून बोलाविणे; किंवा इस्लाम कबूल केल्यानंतर आणि तौबा करुन घेतल्यानंतर त्याला पूर्वीच्या धर्म आणि पापाकडे संबोधित करणे, उदाहरणार्थ त्याला काफिर, व्याभिचारी किंवा दारूड्या वगैरे म्हणणे हे फार वाईट काम आहे. अल्‌इस्म येथे अज्‌जिक्रच्या अर्थांत आहे. तथापि याच्यातून काही ती विशिष्ट नांवे काही लोकांजवळ वगळलेली आहेत, जी कोणासाठी मशहूर होऊन जातात. आणि तो यावर आपल्या मनांत दु:ख पण करत नसेल. जसे लंगडेपणामुळे, कोणाचे नांव लंगडा पडून जाईल; काळ्या रंगामुळे काळ्या किंवा काळू, मशहूर होऊन जाईल वगैरे. (अल्‌ कुर्तबी)

११) 'जन्न' चा अर्थ आहे गुमान (तर्क) करणे. अर्थ आहे की, भल्या लोकांसाठी आणि ईशभय बाळगणाऱ्यांच्या बाबतीत, अशा कल्पना बाळगणे ज्याला काही आधार नाही आणि आळ आणि कुभांडात मोडतात. म्हणून याचे भाषांतर 'चुकीच्या कल्पना' असे केले जाते. आणि हदीसमध्ये याला अक्‌जबुल् हदीस (सर्वात मोठे असत्य) म्हणून, यापासून वांचण्याची ताकीद केली गेली आहे. इय्याकुम्, वज्‌जन्न (स. बुखारी,स.मुस्लिम) नाही तर आज्ञाभंजक आणि निरर्थक गोष्टीत व्यस्त असलेल्या लोकांशी त्यांच्या गुन्ह्यांमुळे बदगुमानी बाळगणे, ही ती बदगुमानी नाही जिला येथे गुन्हा म्हणण्यांत आले आहे, आणि यापासून वांचण्याची ताकीद केली गेली आहे. (अल्‌कुर्तबी)

१२) म्हणजे या शोधांत रहावे की, कोणी कमी किंवा दोष ठाऊक होऊन जावा. की त्याला बदनाम करता यावे. ही टेहळणी आहे जी मना आहे. आणि हदीसमध्ये सुद्धा याला मना करण्यांत आले आहे. किंबहुना हुकूम देण्यांत आला आहे की, जर कोणाची कमी कोताई तुम्हांस ठाऊक होऊन जाईल, तर त्यावर पांघरुण घाला. तिला लोकांच्या समोर सांगत फिरू नका. तसेच चौकशी करुन दोष शोधून काढू नका. आजकाल स्वातंत्र्याची मोठी चर्चा आहे. इस्लामने सुद्धा टेहळणीला मना करुन माणसाच्या स्वातंत्र्याला मान्य केले आहे. परंतु त्यावेळेपर्यंत जो पर्यंत तो जगजाहीरपणे वाईट कृत्य करणार नाही. किंवा दुसऱ्याकरीता इजा पोहोचविण्यास कारणीभूत न व्हावे. पश्चिमेने निव्वळ स्वातंत्र्याचा धडा देऊन, लोकांना सार्वत्रिक फिसादाची परवानगी देऊन दिली आहे. त्यामुळे समाजाची संपूर्ण निर्भयता आणि सुख शांती नष्ट होऊन गेली आहे.

१३) निंदेचा अर्थ हा आहे की, दुसऱ्या लोकांसमोर कोणाच्या वाईटपणाचा किंवा कोतायांचा उल्लेख केला जावा, ज्याला तो वाईट समजेल. आणि त्यांच्याकडे अशा गोष्टी लावल्या जातील, ज्या त्याच्यात आढळूनच येत नाहीत, तर ते कुभांड आहे. आपआपल्या जागी दोन्हीही मोठे अपराध आहेत.

१४) म्हणजे कोण्या मुसलमान भावाचे कोणासमोर वाईटपण सांगणे असेच आहे जसे मृत भावाचे मांस खाणे. मृत भावाचे मांस खाणे तर कोणी पसंत करीत नाही. परंतु निंदा करणे लोकांचे फारच आवडीचे खाद्य आहे.

يَاَيُّهَا النَّاسُ اِنَّا خَلَقْنٰكُمْ مِّنْ ذَكَرٍ وَّ اُنْثٰى وَجَعَلْنٰكُمْ شُعُوْبًا وَّ قَبَآئِلَ لِتَعَارَفُوْا ؕ اِنَّ اَكْرَمَكُمْ عِنْدَ اللّٰهِ اَتْقٰكُمْ ؕ اِنَّ اللّٰهَ عَلِيْمٌ خَبِيْرٌ ﴿١٣﴾

**अहो लोकांनो! आम्ही तुम्हा सर्वांस एकाच पुरूष आणि स्त्रीपासून निर्माण केले आहे.[1] आणि यासाठी की तुम्ही आपसांत एक दुसऱ्याला ओळखावे म्हणून, जाती आणि घराणी बनवून दिली आहेत.[2] अल्लाहच्या समीप, तुम्हा सर्वांतून अब्रुदार तो आहे, जो सर्वांत जास्त (अल्लाहला) भिणारा आहे.[3] नि:संशय अल्लाह ज्ञानी व बहुश्रुत (सर्व काही जाणणारा) आहे. (१३)**

قَالَتِ الْاَعْرَابُ اٰمَنَّا ؕ قُلْ لَّمْ تُؤْمِنُوْا وَلٰكِنْ قُوْلُوْۤا اَسْلَمْنَا وَلَمَّا يَدْخُلِ الْاِيْمَانُ فِيْ قُلُوْبِكُمْ ؕ وَاِنْ تُطِيْعُوا اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ لَا يَلِتْكُمْ مِّنْ اَعْمَالِكُمْ شَيْـًٔا ؕ اِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿١٤﴾

**गावंढळ लोक म्हणतात की, आम्ही ईमान आणले; आपण सांगून द्या की वास्तवात तुम्ही ईमान आणले नाही. परंतु तुम्ही असे म्हणा की, आम्ही (विरोध करणे सोडून) आज्ञाधारक झालो आहोत; कारण की, आतांपर्यंत तुमच्या अंत:करणांत ईमान दाखलच झाले नाही.[4] तुम्ही जर अल्लाहचे आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करू लागाल, तर अल्लाह तुमच्या कर्मातून काहीही कमी करणार नाही. नि:संशय अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१४)**

اِنَّمَا الْمُؤْمِنُوْنَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا بِاللّٰهِ وَ رَسُوْلِهٖ ثُمَّ لَمْ يَرْتَابُوْا وَ جٰهَدُوْا بِاَمْوَالِهِمْ وَ اَنْفُسِهِمْ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ؕ اُولٰٓئِكَ هُمُ الصّٰدِقُوْنَ ﴿١٥﴾

**ईमानवाले तर ते आहेत, जे अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर पक्के ईमान आणतील. मग कोण्याही प्रकारचा संशय ठेवणार नाहीत आणि आपल्या द्रव्याने आणि आपल्या जीवांनी, अल्लाहच्या मार्गात जिहाद करीत राहतील. (आपल्या ईमानाच्या दाव्यांत) हेच खरे आणि सत्त्य बोलणारे आहेत.[5] (१५)**

१) म्हणजे आदम عليه السلام आणि हव्वापासून. म्हणजे तुम्हा सर्वांचे मूळ एकच आहे. तुम्ही एकाच आई वडीलांची संतती आहात. अर्थ आहे, कोणाला निव्वळ घराणे आणि वंशाच्या आधारावर, अभिमान बाळगण्याचा हक्क नाही; कारण सर्वांचा वंश, ह.आदम عليه السلام लाच जाऊन मिळतो.

२) 'शऊब' 'शअ्ब' चे अनेकवचन आहे. भाऊबंदकी किंवा मोठे घराणे. शअ्बच्या नंतर कबिला मग अम्मारा, मग फखज मग बतन मग फसीला, आणि मग अशीरा आहे. (फत्हुल कदीर) अर्थ हा आहे की, निरनिराळ्या घराण्यांची भाऊबंदाची आणि कुटुंबाची वांटणी निव्वळ परिचयासाठी आहे. कारण की आपसांत नाते संबंध जोडू शकाल. याचा उद्देश्य एक दुसऱ्यावर श्रेष्ठत्व दाखविण्याचा नाही. जसे की दुर्दैवाने वंश आणि घराण्याला श्रेष्ठत्वाचा आधार बनवून घेण्यांत आला आहे. वास्तविक इस्लामने येऊन त्याला मिटवून दिले होते, आणि त्याला अज्ञान (इस्लाम पूर्वीचे) ठरविले होते.

३) म्हणजे अल्लाहजवळ श्रेष्ठत्वाची कसोटी, घराणे, कुटूंब वंश व मूळ, नाही; जे कोण्या माणसाच्या अखत्यारांतच नाही. परंतु ही कसोटी ईशभय आहे, ज्याचा अंगीकार करणे अथवा न करणे मनुष्याच्या इराद्याच्या अखत्यारांत आहे. हेच महावाक्य त्या धर्मपंडितांचे प्रमाण आहे जे लग्नामध्ये समान वंशाला आवश्यक समजत नाही; आणि फक्त धर्माच्या आधारावर लग्नाला पसंत करतात. (इब्ने कसीर)

४) काही भाष्यकारांजवळ या गावंढळांनी अभिप्रेत बनु असद आणि खुजैमाचे दांभिक लोक आहेत. ज्यांनी दुष्काळांत निव्वळ जकातीच्या वसुली करीता, व ठार होणे आणि कैदी होण्याच्या भीतीला दृष्टीसमोर ठेवून, तोंडाने इस्लाम जाहीर केला होता. त्यांची अंत:करणे ईमान, बरोबर श्रद्धा, आणि मनाचा प्रांजळपणा यापासून खाली होती. (फत्हुल कदीर) परंतु ईमाम इब्ने कसीर जवळ याच्याने ते गावंढळ (जंगलात राहणारे) अभिप्रेत आहेत, जे नवे मुसलमान झाले होते. आणि ईमान अजून त्यांच्या अंत:करणामध्ये पूर्णपणे भिनले नव्हते. परंतु दावा त्यांनी आपल्या मूळ स्थितीपेक्षा जास्त ईमानाचा केला होता. त्यावर त्यांना हा शिष्टाचार शिकविला गेला की, पहिल्याच वेळी ईमानचा दावा बरोबर नाही. हळूहळू प्रगती नंतर, तुम्ही ईमानच्या मर्तब्याला पोहोचाल.

५) न की ते जे फक्त तोंडाने इस्लामला जाहीर करून देता; आणि चर्चित कर्मांची सुरवातीपासून काही अंमलबजावणी करीत नाही.

قُلْ اَتُعَلِّمُوْنَ اللّٰهَ بِدِيْنِكُمْ ؕ وَ اللّٰهُ يَعْلَمُ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ؕ وَاللّٰهُ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ﴿١٦﴾

**(आपण) सांगून द्या की, काय तुम्ही अल्लाहला आपला धार्मिकपणा जाणवीत आहात? [१] अल्लाह प्रत्येक त्या वस्तुला, जी आकाशांत आणि पृथ्वीत आहे, चांगल्या प्रकारे जाणतो. आणि अल्लाह सर्वज्ञानी आहे. [२] (१६)**

يَمُنُّوْنَ عَلَيْكَ اَنْ اَسْلَمُوْا ؕ قُلْ لَّا تَمُنُّوْا عَلَيَّ اِسْلَامَكُمْ ۚ بَلِ اللّٰهُ يَمُنُّ عَلَيْكُمْ اَنْ هَدٰىكُمْ لِلْاِيْمَانِ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿١٧﴾

**आपल्या मुसलमान होण्याचे आपल्या (सल्ल.) वर उपकार दाखवित आहेत. आपण सांगून द्या की, तुमच्या मुसलमान होण्याचा उपकार माझ्यावर ठेवू नका. किंबहुना वास्तविक अल्लाहचा तुमच्यावर उपकार आहे की, त्याने तुम्हाला ईमान आणण्याची सुबुद्धी दिली, जर तुम्ही खरे बोलणारे असाल. [३] (१७)**

اِنَّ اللّٰهَ يَعْلَمُ غَيْبَ السَّمٰوٰتِ وَ الْاَرْضِ ؕ وَ اللّٰهُ بَصِيْرٌۢ بِمَا تَعْمَلُوْنَ ﴿١٨﴾

**नि:संशय अल्लाह आकाश आणि पृथ्वीच्या अदृष्य गोष्टी खूप चांगल्याप्रकारे जाणतो. आणि जे काही तुम्ही करीत आहात त्याला अल्लाह खूप पहात आहे. (१८)**




آياتها ٤٥ (٥٠) سُوْرَةُ قٓ مَكِّيَّةٌ (٣٤) رُكُوْعَاتُهَا ٣

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

قٓ ۚ وَالْقُرْاٰنِ الْمَجِيْدِ ﴿١﴾

**कॉफ; फार मोठ्या महनीय कुरआनाची शपथ! [४] (१)**

بَلْ عَجِبُوْٓا اَنْ جَآءَهُمْ مُّنْذِرٌ مِّنْهُمْ فَقَالَ الْكٰفِرُوْنَ هٰذَا شَيْءٌ عَجِيْبٌ ﴿٢﴾

**परंतु, त्यांना आश्चर्य वाटले की, त्यांच्याजवळ त्यांच्यातूनच एक सावध करणारा आला. तेव्हा काफिरांनी म्हटले की, ही तर फार विलक्षण गोष्ट आहे. [५] (२)**

१) तअ्लिम येथे, बातमी देण्याच्या अर्थात आहे. म्हणजे 'आमन्ना' म्हणून तुम्ही अल्लाहला आपल्या धर्म आणि ईमानाची सूचना देत आहात? किंवा आपल्या मनाची स्थिती अल्लाहला दाखवीत आहात?

२) तर काय तुमच्या अंत:करणांची अवस्थेशी किंवा तुमच्या ईमानाच्या हकीकतीशी तो वाकब नाही?

३) हेच गावंढळ लोक नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला म्हणत की, पहा ! आम्ही मुसलमान होऊन गेलो आणि तुमची मदत केली. जेव्हा की दुसरे अरब आपल्याशी लढण्याला तयार आहेत. अल्लाहतआलाने यांचे खंडन करीत फर्माविले, तुम्ही अल्लाहवर इस्लाम आणल्याबद्दल उपकार दर्शवू नका. यासाठी की तुम्ही प्रांजलमनाने मुसलमान झाले आहात, तर त्याचा फायदा तुम्हांसच होईल न की अल्लाहला. म्हणून हा अल्लाहचा तुमच्यावर उपकार आहे की त्याने तुम्हास इस्लाम कबूल करण्याची सुबुद्धी देऊन दिली. न की तुमचा उपकार अल्लाहवर आहे.

✪ नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम ईदीच्या नमाजीत, सू.कॉफ आणि इकतरबतिस् साअता पढत असत. (स.मुस्लिम) प्रत्येक जुम्याच्या प्रवचनांत पण पढत असत. (स.मुस्लिम) इमाम इब्ने कसीर म्हणतात ईदैन आणि जुम्यांत पढण्याचा अर्थ आहे की, आपण (सल्ल.) मोठ्या समुदायांत हा अध्याय पढत असत. कारण की, याच्यांत सृष्टीच्या निर्मितीची सुरवात, मेल्यानंतर पुन्हा जिवंत होऊन उठणे, कयामत आणि अल्लाहसमोर उभे रहाणे, कर्मांचा हिशेब देणे स्वर्ग आणि नर्क, पुण्यप्रतिफल व शिक्षा, आणि आशा व भय दाखविण्याचे वर्णन आहे.

४) याचे शपथेचे उत्तर महजुफ आहे 'लतुब् असुन्ना' (तुम्ही अवश्य कयामतच्या दिवशी उठविले जाल) काही म्हणतात की याचे उत्तर, याच्या नंतर येणाऱ्या वाणीचा विषय आहे. ज्यांत पैगंबरी आणि कयामतचे पुरावे आहेत. (फत्हुल कदीर आणि इब्ने कसीर)

५) वास्तविक याच्यात काही आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट नाही. प्रत्येक पैगंबर त्याच समाजाचा एक मनुष्य असावयाचा, ज्यांत त्याला पाठविण्यात येत असे. याच हिशेबाने मक्केच्या कुरैशींना भय दाखविण्यासाठी कुरैष मधूनच एका मनुष्याला पैगंबरीकरीता निवडून घेण्यात आले.

ءَاِذَا مِتۡنَا وَكُنَّا تُرَابًا‌ ۚ ذٰ لِكَ رَجۡعٌ ۢ بَعِيۡدٌ ﴿۳﴾

काय आम्ही जेव्हा मरून माती होऊन जाऊ, मग हे परतून येणे दूर (जिवंत करून देणे) (बुद्धीच्या पलीकडे) आहे.③

قَدۡ عَلِمۡنَا مَا تَنۡقُصُ الۡاَرۡضُ مِنۡهُمۡ‌ ۚ وَعِنۡدَنَا كِتٰبٌ حَفِيۡظٌ ﴿۴﴾

जमीन (माती) यांच्यातून जे काही घटविते, ते आम्हास ठाऊक आहे आणि आमच्याजवळ सर्व लक्षांत ठेवणारे पुस्तक आहे.[१] ④

بَلۡ كَذَّبُوۡا بِالۡحَـقِّ لَمَّا جَآءَهُمۡ فَهُمۡ فِىۡۤ اَمۡرٍ مَّرِيۡجٍ ﴿۵﴾

किंबहुना त्यांनी खऱ्या गोष्टीला खोटे म्हटले आहे. जेव्हांकी ती यांच्याजवळ येऊन पोहचली तर ते एका गोंधळलेल्या स्थितीत पडले आहेत.[२] ⑤

اَفَلَمۡ يَنۡظُرُوۡۤا اِلَى السَّمَآءِ فَوۡقَهُمۡ كَيۡفَ بَنَيۡنٰهَا وَزَيَّنّٰهَا وَمَا لَهَا مِنۡ فُرُوۡجٍ ﴿۶﴾

काय त्यांनी आकाशाला आपल्यावर पाहिले नाही? की, आम्ही त्याला कशा प्रकारे बनविले आहे,[३] आणि सुशोभित केले आहे[४] की, याच्यांत कोणी तडा नाही[५] ⑥

وَالۡاَرۡضَ مَدَدۡنٰهَا وَاَلۡقَيۡنَا فِيۡهَا رَوَاسِىَ وَاَنۡۢبَتۡنَا فِيۡهَا مِنۡ كُلِّ زَوۡجٍۢ بَهِيۡجٍ ۙ ﴿۷﴾

आणि जमिनीला आम्ही अंथरूण दिले आहे. आणि तिच्यांत आम्ही पर्वत रोवून दिले आहेत. आणि तिच्यांत आम्ही तऱ्हेतऱ्हेच्या सुंदर वस्तू उगवून दिल्या आहेत.[६] ⑦

تَبۡصِرَةً وَّذِكۡرٰى لِكُلِّ عَبۡدٍ مُّنِيۡبٍ ﴿۸﴾

अशासाठी की, प्रत्येक (आमच्याकडे) वळणाऱ्या सेवकांकरीता पाहण्याचे आणि शहाणपणाचे साधन व्हावे.[७] ⑧

وَنَزَّلۡنَا مِنَ السَّمَآءِ مَآءً مُّبٰرَكًا فَاَنۡۢبَتۡنَا بِهٖ جَنّٰتٍ وَّحَبَّ الۡحَصِيۡدِ ۙ ﴿۹﴾

आणि आम्ही आकाशांतून आशीर्वादरुपी पाणी वर्षविले, आणि याच्यापासून बाग आणि कापणी केलेले धान्य निर्माण केले.[८] ⑨

१) म्हणजे माती, मनुष्यांचे मांस, हाडके आणि केस वगैरेंना जीर्ण शीर्ण करुन खाऊन टाकते. म्हणजे त्याला कण न् कण करुन टाकते. ते न फक्त आमच्या ज्ञानांत आहे, किंबहुना आमच्याजवळ लौहे महफुज मध्ये सुद्धा नोंदलेले आहे. म्हणून या संपूर्ण अवयवांना गोळा करुन, त्यांना दुसऱ्यांदा जिवंत करुन देणे, आमच्यासाठी मुळीच कठीण काम नाही.

२) 'हक' (खरी गोष्ट) ने अभिप्रेत, कुरआन, इस्लाम किंवा ह.मुहम्मद ﷺ ची पैगंबरी आहे. भावार्थ सर्वांचा एकच आहे. 'मरीज' चा अर्थ, मिसळलेला, बेचैन, गोंधळलेला असा आहे. म्हणजे असा मामला जो त्यांच्यावर शंकास्पद होऊन गेला आहे. ज्यामुळे ते एका गोंधळांत पडले आहेत. कधी त्याला जादूगीर म्हणतात, कधी, कवी, आणि कधी, काहिन.

३) म्हणजे स्तंभाविना.

४) म्हणजे नक्षत्रांनी त्याला सुशोभित केले.

५) अशाच प्रकारे कोणी फरक आणि तडा सुद्धा नाहीत. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''ज्याने साती आकाशांना वर खाली निर्माण केले. तर हे पहाणाऱ्या! अल्लाह रहमानच्या निर्मितीमध्ये तू काही गैर कायदेशीर पाहणार नाही. दुसऱ्यांदा दृष्टी टाकून पाहून घे ! की कोठे काही तडा पण दृष्टीस पडतो आहे. मग दुसऱ्यांदा पुन्हा पुन्हा पाहून घे तुझी नजर लाजीरवाणी होऊन, थकून भागून, तुझ्याकडे परत येईल.'' (सू.मुल्क ३-४)

६) आणि काहींनी 'जौज', चा अर्थ जोडपे केला आहे. म्हणजे प्रत्येक प्रकारची वनस्पती, आणि गोष्टींना जोडपे (नर आणि मादी) बनविले आहे. 'बहीज' चा अर्थ, दिसावयास चांगले, सुपिक आणि सुंदर.

७) म्हणजे आकाश आणि पृथ्वीची निर्मिती, आणि दुसऱ्या गोष्टींना अनुभवणे, आणि त्यांची ओळख, प्रत्येक त्या माणसासाठी, अवलोकन आणि शहाणपण आणि बोध व उपदेशाला कारणीभूत आहे, जो अल्लाहकडे वळणारा आहे.

८) कापणी केलेल्या धान्याने अभिप्रेत ती शेते आहेत, ज्यांच्यातून गहू, मका, ज्वारी, बाजरी, डाळी आणि तांदूळ वगैरे निर्माण होतात. आणि मग त्यांचा साठा करुन घेण्यात येतो.

وَالنَّخْلَ بٰسِقٰتٍ لَّهَا طَلْعٌ نَّضِيْدٌ ۝١٠

आणि खजुरींचे उंच उंच वृक्ष की, ज्यांचे झुबके एकावर एक आहेत[१] १०

رِّزْقًا لِّلْعِبَادِ ۙ وَاَحْيَيْنَا بِهٖ بَلْدَةً مَّيْتًا ؕ كَذٰلِكَ الْخُرُوْجُ ۝١١

(आमच्या) सेवकांच्या आहाराकरितांआणि आम्ही पावसाने मृत शहराला जिवंत करून टाकले. अशाच तऱ्हेने (थडग्यापासून) निघणे आहे.[२] ११

كَذَّبَتْ قَبْلَهُمْ قَوْمُ نُوْحٍ وَّاَصْحٰبُ الرَّسِّ وَثَمُوْدُ ۝١٢

यांच्यापूर्वी नूहच्या लोकांनी, आणि खंदकवाल्यांनी[३] आणि 'समूद' ने १२

وَعَادٌ وَّفِرْعَوْنُ وَاِخْوَانُ لُوْطٍ ۝١٣

आणि 'आद' ने, आणि फिरऔनाने आणि लूतच्या बांधवांनी १३

وَّاَصْحٰبُ الْاَيْكَةِ وَقَوْمُ تُبَّعٍ ؕ كُلٌّ كَذَّبَ الرُّسُلَ فَحَقَّ وَعِيْدِ ۝١٤

आणि 'ऐका'[४] वाल्यांनी, आणि तूब्बाच्या लोकांनी[५] पण नाकारले होते. सर्वांनी पैगंबरांना खोटे ठरवले;[६] तेव्हा माझे शिक्षेचे वचन त्यांच्यावर सिद्ध झाले. १४

اَفَعَيِيْنَا بِالْخَلْقِ الْاَوَّلِ ؕ بَلْ هُمْ فِيْ لَبْسٍ مِّنْ خَلْقٍ جَدِيْدٍ ۝١٥ ع ١٥

काय आम्ही पहिल्या वेळेस निर्माण करण्याने थकून गेलो?[७] किंबहुना हे लोक नवीन निर्माण करण्यापासून संशयात पडले आहेत[८] १५

१) बासिकातचा अर्थ उंचच उंच 'तलऊन' खजुरचे पिकण्यांस आलेले कच्चे पक्के फळ जे पहिल्यांदाच प्रथम निघते. 'नजीद' चा अर्थ एकावर एक. बागांमध्ये खजुरीचे फळ पण येऊन जाते; परंतु याचा वेगळा, विशेष म्हणून उल्लेख केला. ज्याच्याने खजुरीचे ते महत्त्व स्पष्ट आहे, जे अरबांमध्ये त्याला प्राप्त आहे.

२) म्हणजे ज्याप्रमाणे पावसाने मृत जमिनीला जिवंत आणि टवटवीत करून देतो, अशाच प्रकारे आम्ही कयामतच्या दिवशी कबरींतून माणसांना जिवंत करून काढू.

३) 'असहाबुर रस्स' च्या बाबतीत भाष्यकारांत फारच मतभेद आहेत. इमाम इब्ने जरीर तब्रीने, या म्हणण्याला प्राधान्य दिले आहे, ज्यात त्यांना खंदकवाले ठरविण्यात आले आहे. ज्याचा उल्लेख सू.बूरुजमध्ये आहे. (तपशीलाकरीता पहावे, तफसीर इब्ने कसीर व फत्हूल कदीर, सू.फुर्कान आ-३८)

४) 'अस्हाबुल ऐका' करीता पहावे, सू.शूअरा आ.१७६ चा समास.

५) 'कौमे तुब्बा' करता पहावे सू.दुखान आ.३७ चा समास.

६) म्हणजे यांच्यातून प्रत्येकाने आपआपल्या पैगंबरांना खोटे ठरविले. याच्यांत रूलुल्लाह ﷺ करीता सांत्वना आहे. जणूंआपणांस सांगण्यात येत आहे की, आपण आपल्या लोकांकडून आपल्याला खोटे म्हणण्यामुळे दु:खी होऊं नये. यासाठी की ही काही नवी गोष्ट नाही. आपल्या पूर्वीच्या पैगंबरांबरोबर सुद्धा या लोकांनी हाच मामला केला, दुसरे, मक्कावाल्यांना तंबी आहे की, मागील लोकांनी पैगंबरांना खोटे ठरविले, पाहून घ्या! त्यांचा काय परिणाम झाला? काय तुम्ही सुद्धा आपल्या करीता हाच परिणाम पसंत करीता? जर हा परिणाम पसंत करीत नाही तर खोटे म्हणण्याचा मार्ग सोडून द्या; आणि पैगंबरांवर ईमान घेऊन या.

७) हे कयामतच्या दिवशी दुसऱ्यादा जिवंत करणे, आमच्यासाठी कठीण असेल? अर्थ हा आहे की, जेव्हा पहिल्या वेळेस निर्माण करणे, आमच्या करिता कठीण नव्हते, तर दुसऱ्यांदा जिवंत करणे तर पहिल्या वेळेस निर्माण करण्यापेक्षा जास्त सोपे आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''तोच आहे ज्याने सुरवाती सुरवातीला सृष्टी निर्माण केली. तोच आहे, जो दुसऱ्यांदा पुन्हा निर्माण करील, आणि हे तर त्याच्यासाठी फारच सोपे आहे.'' (सू.रुम- २७) सू.यासिन आ.७८-७९ मध्ये सुद्धा हा विषय वर्णन करण्यात आला आहे. आणि हदीसे कुदसी मध्ये आहे, अल्लाहतआला फर्माविती, ''आदमचा मुलगा हे सांगून मला इजा पोहचवितो की, अल्लाह मला दुसऱ्यादा मुळीच निर्माण करण्यास समर्थ नाही. ज्याप्रमाणे त्याने मला पहिल्यांदा निर्माण केले. वास्तविक पहिल्या वेळेस निर्माण करणे, दुसऱ्या वेळेस निर्माण करण्यापेक्षा जास्त सोपे नाही.'' म्हणजे जर कठीण आहे तर पहिल्या वेळेस निर्माण करणे; न की, दुसऱ्या वेळेस. (अलबुखारी तफसीर सू.इखलास)

८) म्हणजे हे अल्लाहच्या सामर्थ्याला नाकारणारे नाहीत. किंबहुना खरी गोष्ट आहे की, यांना कयामतच्या घडून येण्यांत, आणि तिच्यांत दुसऱ्यांदा जीवनाच्या बाबतीतच शंका आहे.

وَلَقَدۡ خَلَقۡنَا ٱلۡإِنسَٰنَ وَنَعۡلَمُ مَا تُوَسۡوِسُ بِهِۦ نَفۡسُهُۥۖ وَنَحۡنُ أَقۡرَبُ إِلَيۡهِ مِنۡ حَبۡلِ ٱلۡوَرِيدِ ١٦

आम्ही मनुष्याला निर्माण केले आहे. आणि त्याच्या मनांत जे विचार उडतात त्यांच्याशी आम्ही वाकब आहोत (१) आणि आम्ही त्याच्या मुख्यधमनी पेक्षाही जास्त जवळ आहोत (२) १६

إِذۡ يَتَلَقَّى ٱلۡمُتَلَقِّيَانِ عَنِ ٱلۡيَمِينِ وَعَنِ ٱلشِّمَالِ قَعِيدٞ ١٧

ज्यावेळी दोन (नोंद) घेणारे जातात एक उजवीकडे आणि एक डावीकडे बसलेला आहे. १७

مَّا يَلۡفِظُ مِن قَوۡلٍ إِلَّا لَدَيۡهِ رَقِيبٌ عَتِيدٞ ١٨

(मनुष्य) तोंडाने कोणी शब्द उच्चारीत नाही, परंतु एक पहारेकरी त्याच्याजवळ तयार रहातो (३) १८

وَجَآءَتۡ سَكۡرَةُ ٱلۡمَوۡتِ بِٱلۡحَقِّۖ ذَٰلِكَ مَا كُنتَ مِنۡهُ تَحِيدُ ١٩

आणि मृत्यूची सक्ती तर खचित्च येईलच (४) येईल, हीच आहे ज्यापासून तू पळत होतास (५) १९

وَنُفِخَ فِي ٱلصُّورِۚ ذَٰلِكَ يَوۡمُ ٱلۡوَعِيدِ ٢٠

आणि सूर फुंकून दिला जाईल, शिक्षेच्या वायद्याचा दिवस हाच आहे. (६) २०

وَجَآءَتۡ كُلُّ نَفۡسٖ مَّعَهَا سَآئِقٞ وَشَهِيدٞ ٢١

आणि प्रत्येक मनुष्य अशाच प्रकारे येईल की त्याच्या बरोबर एक आणणारा असेल आणि एक साक्षी २१

لَّقَدۡ كُنتَ فِي غَفۡلَةٖ مِّنۡ هَٰذَا فَكَشَفۡنَا عَنكَ غِطَآءَكَ فَبَصَرُكَ ٱلۡيَوۡمَ حَدِيدٞ ٢٢

खचित्च तू या (दिवस) कडून गफलतीत होतास; परंतु आम्ही तुझ्या समोरुन पर्दा उचलून दिला आहे. म्हणून आज तुझी नजर फारच तिक्ष्ण आहे २२

وَقَالَ قَرِينُهُۥ هَٰذَا مَا لَدَيَّ عَتِيدٌ ٢٣

त्याचा साथी (देवदूत) म्हणेल, हे हजर आहे, जे की मजजवळ होते. (७) २३

أَلۡقِيَا فِي جَهَنَّمَ كُلَّ كَفَّارٍ عَنِيدٖ ٢٤

नरकाग्नीत झोंकून द्या प्रत्येक शिरजोर काफिराला २४

१) म्हणजे मनुष्य जे काही लपवितो आणि मनांत दडवून ठेवतो; ते सर्व आम्ही जाणतो. 'वसवसा' मनांत येऊन जाणाऱ्या विचारांना म्हणतात. ज्याचे ज्ञान त्या माणसाशिवाय कोणाला नसते. परंतु अल्लाह त्या विचारांना पण जाणतो. म्हणूनच हदीसमध्ये येते, ''अल्लाहतआलाने माझ्या उम्मतीच्या मनांत येऊन जाणाऱ्या विचारांना क्षमा करून टाकले आहे. म्हणजे याच्यावर पकड करणार नाही. जोपर्यंत ते तोंडाने याला जाहीर, किंवा यावर कर्म करणार नाहीत.'' (अल्बुखारी, स.मुस्लिम)

२) 'वरीद' मुख्य धमनी किंवा प्राणाच्या धमनीला म्हटले जाते. जिच्या कापल्याने मृत्यू घडून येतो ही धमनी घशाच्या एका किनाऱ्याकडून माणसाच्या खांद्यापर्यंत असते. या सानिध्याने अभिप्रेत ज्ञानाचे सानिध्य आहे. म्हणजे ज्ञानाच्या दृष्टीने आम्ही माणसाच्या बिल्कुल किंबहुना इतके जवळ आहोत की, त्याच्या मनांतील गोष्टी सुद्धा जाणतो. इमाम इब्ने कसीर म्हणतात, की 'नहनु' ने अभिप्रेत देवदूत आहेत. म्हणजे आमचे देवदूत मनुष्याच्या प्राणाच्या धमनीपेक्षा सुद्धा जवळ आहेत. कारण की मनुष्याच्या उजवीकडे डावीकडे दोन देवदूत नेहमी उपस्थित असतात. ते मनुष्याच्या प्रत्येक गोष्टीला आणि कर्माला नोंदवित असतात. इमाम शौकानीने याचा अर्थ सांगितला आहे की, आम्ही माणसाच्या सर्व अहवालाला जाणतो. याच्याशिवाय की, आम्ही त्या देवदूतांचे गरजवंत असावे, ज्यांना आम्ही मनुष्याची कर्मे आणि म्हणणे लिहीण्याकरिता नेमलेले आहे. हे देवदूत तर आम्ही फक्त तर्क पूर्ण करण्यासाठी नेमलेले आहेत. दोन देवदुतांनी अभिप्रेत काहींच्या जवळ एक पुण्याला आणि दुसरा पापाला लिहीणारा आहे. आणि काहीजवळ रात्र आणि दिवसाचे देवदूत आहेत. रात्रीचे दोन देवदूत वेगळे, आणि दिवसाचे दोन देवदूत वेगळे (फत्हुल कदीर)

३) 'रकीब' संरक्षक, पहारेकरी, आणि मनुष्याच्या कथनी व करणीची प्रतीक्षा करणारे. 'अतीद' उपस्थित आणि तयार.

४) दुसरा अर्थ याचा हा आहे की, मृत्यूची सक्ती अवश्य नक्कीच येईल. म्हणजे जाहीर होऊन जाते; जे कयामत, स्वर्ग नर्कच्या बाबतीत पैगंबर देत आले आहेत.

५) ''तहीद,'' तू या मृत्यूपासून बुजत होता आणि पळ काढीत होता.

६) साइक (हांकलणारा) आणि शहीद (साक्षीदार) च्या बाबतीत मतभेद आहेत. इमाम तिबरी जवळ हे दोन देवदूत आहेत. एक मनुष्याला हशरच्या मैदानापर्यंत हांकून आणणारा आणि दुसरा साक्ष देणारा.

७) म्हणजे देवदूत मनुष्याचा सर्व रेकार्ड समोर ठेवून देईल. आणि म्हणेल हा तुझ्या कर्मांचा लेखाजोखा आहे, जो

مَّنَّاعٍ لِّلْخَيْرِ مُعْتَدٍ مُّرِيبٍ ﴿٢٥﴾

**जो सत्कार्यास मनाई करणारा, मर्यादेचे उल्लंघन करणारा आणि शंका घेणारा होता.** (२५)

الَّذِي جَعَلَ مَعَ اللَّهِ إِلَٰهًا آخَرَ فَأَلْقِيَاهُ فِي الْعَذَابِ الشَّدِيدِ ﴿٢٦﴾

**ज्याने अल्लाहसमवेत दुसरा उपास्य बनवून घेतला होता. तर त्याला आता सक्त शिक्षेत नेऊन टाका**[१] (२६)

قَالَ قَرِينُهُ رَبَّنَا مَا أَطْغَيْتُهُ وَلَٰكِن كَانَ فِي ضَلَالٍ بَعِيدٍ ﴿٢٧﴾

**(मग) त्याचा सोबती (शैतान) म्हणेल, हे माझ्या पालनकर्त्या! मी तर याला मार्गभ्रष्ट केले नव्हते, किंबहुना हा स्वतःच पराकाष्ठेच्या बहकण्यात (पडलेला) होता.**[२] (२७)

قَالَ لَا تَخْتَصِمُوا لَدَيَّ وَقَدْ قَدَّمْتُ إِلَيْكُم بِالْوَعِيدِ ﴿٢٨﴾

**अल्लाहतआला फर्माविल, पुरे! माझ्या समोर झगड्याची गोष्ट करू नका. मी तर पूर्वीच तुमच्याकडे (शिक्षेचा वायदा) पाठवून चुकलो होतो**[३] (२८)

مَا يُبَدَّلُ الْقَوْلُ لَدَيَّ وَمَا أَنَا بِظَلَّامٍ لِّلْعَبِيدِ ﴿٢٩﴾

**माझ्या जवळ गोष्ट बदलत नसते.**[४] **आणि न मी आपल्या सेवकांवर जुलूम करणारा आहे.**[५] (२९)

يَوْمَ نَقُولُ لِجَهَنَّمَ هَلِ امْتَلَأْتِ وَتَقُولُ هَلْ مِن مَّزِيدٍ ﴿٣٠﴾

**ज्या दिवशी आम्ही नरकाग्नीला विचारू, काय तू भरून चुकला? तो उत्तर देईल की काही आणखीही जास्त आहे?**[६] (३०)

وَأُزْلِفَتِ الْجَنَّةُ لِلْمُتَّقِينَ غَيْرَ بَعِيدٍ ﴿٣١﴾

**आणि स्वर्ग भिऊन वागणाऱ्यांसाठी बिलकुल जवळ करून दिला जाईल, जरा पण दूर असणार नाही.**[७] (३१)

१) अल्लाहतआला या कर्माच्या रेकार्डच्या प्रकाशांत, न्याय आणि फैसला करील.
२) म्हणून त्याने लगेच माझे म्हणणे मान्य केले. हा जर तुझा प्रांजल सेवक असता तर माझ्या बहकविण्यांत आला नसता. येथे 'करीन' (साथी) ने अभिप्रेत शैतान आहे.
३) म्हणजे अल्लाहतआला काफिरांना आणि त्यांच्या साथीदार शैतानांना म्हणेल, येथे हिशेब घेण्याला निलंबित करण्याची किंवा न्यायाच्या दरबारांत भांडण करण्याची, आवश्यकता नाही; न त्यापासून काही फायदा होईल. मी तर पूर्वीच पैगंबर आणि पुस्तकांमार्फत या शिक्षेच्या वायद्यांकडून तुम्हांस सावध करून दिले होते.
४) म्हणजे जे वायदे मी केले होते, त्यांच्या विरुद्ध होणार नाही. परंतु हे कुठल्याही स्वरुपांत पूर्ण होतील. आणि याच तत्त्वाप्रमाणे, तुमच्या करिता, शिक्षेचा निर्णय माझ्याकडून झाला आहे. ज्यांत बदल होऊ शकत नाही.
५) की, अपराधाशिवाय, जो त्यांनी केला नसेल व गुन्ह्यांशिवाय जो त्यांच्याकडून सादर झाला नसेल, मी त्यांना शिक्षा देऊन टाकावी? 'जल्ला' येथे जुलुमीच्या अर्थांत आहे. किंवा म्हणीनुसार बोलण्यांत आला आहे. जसे सर्व साधारण बोलण्यात येते की, अमुक मनुष्य आपल्या दातांवर मोठा जुलूम करतो. अमुक मनुष्य मोठा जुलूमी आहे उद्देश्य अतिशयोक्तीचा नाही, किबहुना फक्त त्याच्याकडून जुलूम केला गेल्याचे जाहीर होते किंवा उद्देश्य नकारात्मक अतिशयोक्ती आहे, म्हणजे मी सेवकांवर जरा सुद्धा जुलूम करणारा नाही.
६) अल्लाहतआलाने फर्माविले आहे. ''मी नरकाग्नीला मनुष्ये आणि जिन्नांनी भरून टाकेन'' (सू.अलीफ-लाम-मीम-सज्दा-१३) या वायद्याची जेव्हा पूर्तता होऊन जाईल, आणि अल्लाहतआला काफिर, जिन्न आणि मनुष्यांना नरकाग्नीत टाकून देईल, तेव्हा नरकाग्नीला विचारील की, तू भरला गेला आहे की, नाही? तो उत्तर देईल, काय आणखी ही काही आहे? म्हणजे जरी मी भरुन गेलो आहे, परंतु हे अल्लाह ! तुझ्या शत्रुंकरीता माझ्यांत आतासुद्धा जागा आहे. नरकाग्नीशी अल्लाहतआलाचे हे संभाषण आणि नरकाग्नीचे उत्तर देणे, अल्लाहच्या सामर्थ्याला मुळीच कमतरता आणणारे नाही. हदीसमध्ये सुद्धा येते, ''अग्नीत लोक टाकले जातील. आणि नरकाग्नी म्हणेल. काय आणखीही काही आहे? येथे पावेतो की, अल्लाहतआला नरकाग्नीत आपला पाय ठेवून देईल. ज्यामुळे नरकाग्नी ओरडून उठेल, पुरे ! पुरे!! (स.बुखारी, तफसीर, सू.कॉफ) आणि स्वर्गाच्या बाबतीत येते की, स्वर्गात अजून जागा खाली राहील, तेव्हा अल्लाहतआला त्याच्या करता नवी सृष्टी निर्माण करील, जी तेथे वस्ती करेल. (स.मुस्लिम)
७) आणि काहींनी म्हटले आहे की, कयामतच्या दिवशी स्वर्ग जवळ करुन दिला जाईल, दूर नाही. कारण ती खरोखरच घडून येणार आहे आणि कुल्ल मा हुव आतिन् करीब, आणि जी पण येणारी गोष्ट आहे, ती जवळच आहे, दूर नाही (इब्ने कसीर)

هٰذَا مَا تُوْعَدُوْنَ لِكُلِّ اَوَّابٍ حَفِيْظٍ ۝٣٢

हे आहे, ज्याचा तुमच्याशी वायदा केला जात होता. प्रत्येक त्या माणसासाठी जो (अल्लाहकडे) वळणारा आणि हक्कांचे संरक्षण करणारा असेल.[१] ३२

مَنْ خَشِيَ الرَّحْمٰنَ بِالْغَيْبِ وَجَآءَ بِقَلْبٍ مُّنِيْبِ ۝٣٣

जो परम दयाळूला बिन पाहता भित असेल, आणि अनुतप्त अंत:करण घेऊन हजर झाला असेल.[२] ३३

اِۨدْخُلُوْهَا بِسَلٰمٍ ؕ ذٰلِكَ يَوْمُ الْخُلُوْدِ ۝٣٤

तुम्ही या स्वर्गांत सुखा समाधानाने दाखल व्हा. हाच सतत राहण्याचा दिवस आहे. ३४

لَهُمْ مَّا يَشَآءُوْنَ فِيْهَا وَلَدَيْنَا مَزِيْدٌ ۝٣٥

हे तेथे जे इच्छितील, त्यांचेच आहे. (किंबहुना) आमच्याजवळ आणखी सुद्धा जास्त आहे.[३] ३५

وَكَمْ اَهْلَكْنَا قَبْلَهُمْ مِّنْ قَرْنٍ هُمْ اَشَدُّ مِنْهُمْ بَطْشًا فَنَقَّبُوْا فِي الْبِلَادِ ؕ هَلْ مِنْ مَّحِيْصٍ ۝٣٦

आणि यांच्यापूर्वी सुद्धाआम्ही कित्येक पिढ्यांना नष्ट करून चुकलो आहोत. जे यांच्यापेक्षा बळांत जबरदस्त होते. ते शहरांत ढुंढाळतच राहून गेले[४] की, कोठे पळून जाण्यांस जागा आहे. ३६

اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَذِكْرٰى لِمَنْ كَانَ لَهٗ قَلْبٌ اَوْ اَلْقَى السَّمْعَ وَهُوَ شَهِيْدٌ ۝٣٧

याच्यांत प्रत्येक अंत:करण[५] बाळगणाऱ्याला बोध आहे; आणि[६] त्याच्यासाठी जो मनाने एकाग्र होऊन कान लावेल (म्हणजे ऐकतो) आणि तो हजर[७] असेल ३७

وَلَقَدْ خَلَقْنَا السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ وَمَا بَيْنَهُمَا فِيْ سِتَّةِ اَيَّامٍ ۖ وَّمَا مَسَّنَا مِنْ لُّغُوْبٍ ۝٣٨

खचित्च आम्ही आकाश आणि पृथ्वी, आणि जे काही याच्या दर्म्यान आहे, सर्वांना फक्त सहा दिवसांत निर्माण करून टाकले. आणि आम्हांस थकव्याने स्पर्श सुद्धा केला नाही. ३८

فَاصْبِرْ عَلٰى مَا يَقُوْلُوْنَ وَسَبِّحْ بِحَمْدِ رَبِّكَ قَبْلَ طُلُوْعِ الشَّمْسِ وَقَبْلَ الْغُرُوْبِ ۝٣٩

तर हे जसजशा गोष्टी करतात, तुम्ही त्या सहन करा. आणि आपल्या पालनकर्त्याच्या स्तवनाबरोबर त्याची पवित्रता वर्णन करा, सूर्योदयाच्या पूर्वी आणि सूर्यास्तापूर्वी[८] ३९

१) म्हणजे जेव्हा ईमानवाले स्वर्गांना आणि त्याच्या देणग्यांना जवळून पाहतील, तेव्हा सांगण्यात येईल की, हाच तो स्वर्ग आहे ज्याचा वायदा अल्लाहकडे वळणारा प्रत्येक आणि (हक्कांचे) संरक्षण करणाऱ्यांशी केला गेला होता. 'अव्वाब' खूप झुकणारा म्हणजे अल्लाहकडे भरपूर पश्चात्ताप व्यक्त करणारा आणि क्षमायाचना करणारा, अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्मरण करणारा, एकांतात आपल्या गुन्ह्यांना आठवून, अल्लाहच्या समक्ष व्याकूळ होणारा, प्रत्येक सभेत क्षमायाचना करणारा. हफीज, आपल्या गुन्ह्यांना आठवून त्यांच्यापासून पश्चात्ताप व्यक्त करणारा किंवा अल्लाहचे हक्क आणि त्याच्या देणग्यांना लक्षांत ठेवणारा किंवा अल्लाहच्या हुकुमांना आणि मनाईंना लक्षांत ठेवणारा. (फत्हुल कदीर)

२) मुनीब, अल्लाहकडे वळणारा आणि त्याचे आज्ञापालन करणारे अंत:करण किंवा 'सलीम' च्या अर्थात शिर्क आणि पापांच्या घाणीपासून पवित्र मन.

३) याच्याने अभिप्रेत अल्लाहतआलाचे दर्शन आहे. जे स्वर्गवाश्यांच्या नशीबी येईल. जसे की, ''लिल्लजीन अहसनुल् हुस्ना व जियादाह'' (सू.यूनुस-२६) च्या भाष्यांत येऊन चुकले.

४) 'फनक्कबु फिल् बिलाद' (शहरांत चालावे फिरावे) चा एक आणखी अर्थ हा सांगण्यात आला आहे की, ते या मक्का वाल्यांपेक्षा जास्त, व्यापार आणि कारभारासाठी निरनिराळ्या शहरांत, फिरत असत. परंतु आमची शिक्षा आली तेव्हा त्यांना कोठे आश्रय आणि पळून जाण्याचा मार्ग भेटला नाही.

५) म्हणजे जागृत मन, जे चिंतन आणि मनन करून, खऱ्या गोष्टीला जाणून घेतील.

६) म्हणजे लक्ष देऊन ते अल्लाहच्या वह्याला ऐकतील ज्यांत मागील समूहांच्या घटना वर्णन करण्यात आल्या आहेत.

७) म्हणजे चित्त आणि बुद्धीच्या अनुषंगाने हजर असतील. यासाठी की, ज्या गोष्टीला ते समजणार नाही, ते उपस्थित असून सुद्धा असे आहेत, जसे उपस्थित नाही.

८) म्हणजे सकाळ सांज अल्लाहचे पावित्र्य वर्णन करा. किंवा फज्र आणि असरची नमाज पढण्याची ताकीद आहे.

وَمِنَ الَّيْلِ فَسَبِّحْهُ وَاَدْبَارَ السُّجُوْدِ ﴿٤٠﴾

**आणि रात्रीच्या कोण्या समयी सुद्धा [१] स्तुती करा आणि नमाजीनंतर सुद्धा [२] ४०**

وَاسْتَمِعْ يَوْمَ يُنَادِ الْمُنَادِ مِنْ مَّكَانٍ قَرِيْبٍ ﴿٤١﴾

**आणि ऐकून ठेवा, [३] ज्या दिवशी एक पुकारणारा [४] जवळच्या जवळून हांक मारील [५] ४१**

يَّوْمَ يَسْمَعُوْنَ الصَّيْحَةَ بِالْحَقِّ ذٰلِكَ يَوْمُ الْخُرُوْجِ ﴿٤٢﴾

**ज्या दिवशी या भयानक आणि तीव्र आरोळीला सत्यपूर्ण ऐकून घेतील; तो निघण्याचा दिवस असेल. [६] ४२**

اِنَّا نَحْنُ نُحْيٖ وَنُمِيْتُ وَاِلَيْنَا الْمَصِيْرُ ﴿٤٣﴾

**आम्हीच जिववितो आणि आम्हीच मारतो. [७] आणि आमच्याचकडे हिरुन फिरून येणे आहे. [८] ४३**

يَوْمَ تَشَقَّقُ الْاَرْضُ عَنْهُمْ سِرَاعًا ذٰلِكَ حَشْرٌ عَلَيْنَا يَسِيْرٌ ﴿٤٤﴾

**ज्या दिवशी जमीन फाटून जाईल, आणि हे पळत पळत (निघून पडतील); [९] हे गोळा करून घेणे आमच्यासाठी फारच सोपे आहे. ४४**

نَحْنُ اَعْلَمُ بِمَا يَقُوْلُوْنَ وَمَآ اَنْتَ عَلَيْهِمْ بِجَبَّارٍ فَذَكِّرْ بِالْقُرْاٰنِ مَنْ يَّخَافُ وَعِيْدِ ﴿٤٥﴾

**हे जे काही म्हणत आहे, ते आम्ही खूप जाणून आहोत. आणि तुम्ही त्यांच्यावर जबरदस्ती करणारे तर नाहीच. [१०] तर तुम्ही कुरआनाच्या माध्यमातून त्यांना समजावित रहा. जे कोणी माझ्या भिवविणाऱ्या वायद्यांना भितात. [११] ४५**

१) म्हणजे रात्रीच्या काही भागांत सुद्धा अल्लाहचे स्मरण करा. किंवा रात्रीची नमाज (तहज्जुद) पढा. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''रात्री उठून तहज्जुदची नमाज पढावी. जी तुमच्या करीतांअधिक पुण्याला कारणीभूत आहे.'' (सू.बनी इसराईल-७९) काही म्हणतात की, मेअराजच्यापूर्वी मुसलमानांकरीता फक्त फज्र आणि असरची नमाज, आणि नबी ﷺ करीता, तहज्जुदची नमाज पण फर्ज होती. मेअराजच्या प्रसंगी पांच नमाजी फर्ज करुन देण्यांत आल्या (इब्ने कसीर)

२) म्हणजे अल्लाहचे स्तवन करावे. काहींनी याच्याने ते जप अभिप्रेत धरले आहेत, जे करण्याची ताकीद नबी ﷺ नी फर्ज नमाजीच्या नंतर केली आहे. उदाहरणार्थ ३३ वेळेस सुब्हानल्लाह्, ३३ वेळेस अल्हम्दीलिल्लाह् आणि ३४ वेळेस अल्लाहु अकबर वगैरे (अल्बुखारी) परंतु हे जप या अध्यायाच्या प्रकटीकरणाच्या बऱ्याच काळानंतर दाखविण्यांत आले होते. काहींनी म्हटले आहे की, 'अद्बारस् सुजुद' ने अभिप्रेत मगरीब नंतर दोन रकाती आहेत.

३) म्हणजे कयामतचे जे अहवाल, वहीमार्फत वर्णन केले जात आहे, त्यांना लक्षपूर्वक ऐका.

४) हा हाक मारणारा इसराफील देवदूत असेल किंवा जिब्रईल आणि ही पुकार ती असेल जिच्याने लोक हशरच्या मैदानांत गोळा होऊन जातील म्हणजे, दुसरा सूर.

५) याच्याने काहींनी बैतुल मुकद्दसचा ओटा अभिप्रेत धरला आहे. असे म्हणतात की, आकाशाची फारच जवळची जागा आहे. आणि काही जवळ याचा अर्थ हा आहे की, प्रत्येक मनुष्य हा आवाज अशा प्रकारे ऐकेल, जसे याच्याजवळूनच हा आवाज येत आहे, (फत्हुल कदीर) आणि हेच योग्य आहे.

६) म्हणजे ही आरोळी किंवा कयामतचा सूर खचित्च होईल; ज्यांत हे जगांत शंका करीत होते. आणि हाच दिवस थडग्यांपासून जिवंत होऊन निघण्याचा असेल.

७) म्हणजे जगांत मृत्यू देणे आणि परलोकांत जिवंत करून देणे, हे आमचेच काम आहे. याच्यांत आमचा कोणी सरकतदार नाही.

८) तेथे आम्ही प्रत्येक मनुष्याला त्याच्या कर्माप्रमाणे बदला देऊ.

९) म्हणजे त्या आवाज देणाऱ्याकडे पळतील, ज्याने आवाज दिला असेल. (फत्हुल कदीर) नबी ﷺ नी फर्माविले, जेव्हा जमीन फाटेल तेव्हा सर्वांत प्रथम जिवंत होऊन निघणारा मी असेन (स.मुस्लिम)

१०) म्हणजे आपण या गोष्टीला जबाबदार नाहीत की, यांना ईमान आणण्यास भाग पाडावे. किंबहुना आपले काम फक्त प्रचार आणि आवाहन करणे आहे, ते करीत रहा.

११) म्हणजे आपल्या आवाहन आणि चर्चेने तोच बोध ग्रहण करील, जो अल्लाह आणि त्याच्या धमकावर्णीना भीत असेल आणि त्याच्या वायद्यांवर विश्वास ठेवत असेल. म्हणून ह.कतादा رضي الله عنه ही दुआ करीत असत, ''हे अल्लाह ! आम्हांस त्या लोकांमधून कर जे तुझ्या धमकाविण्यांना भीत असतील आणि तुझ्या वायद्यांशी आशा बाळगत असतील, हे उपकार करणाऱ्या आणि दया करणाऱ्या!''

(५१) सू. अज़्ज़ारियात

महावाक्ये ६० — रुकूअ ३

سُوْرَةُ الذّٰرِيٰتِ مَكِّيَّةٌ (٥١) (٦٧) اٰيَاتُهَا ٦٠ رُكُوْعَاتُهَا ٣

बिस्मिल्लाहिर्रहमानिर्रहीम
परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَالذّٰرِيٰتِ ذَرْوًا ۝١
शपथ आहे जे फांकून फांकून वाहून नेतात[१] १

فَالْحٰمِلٰتِ وِقْرًا ۝٢
मग ओझे उचलतात[२] २

فَالْجٰرِيٰتِ يُسْرًا ۝٣
मग हळूहळू चालतात.[३] ३

فَالْمُقَسِّمٰتِ اَمْرًا ۝٤
मग कामाची वाटणी[४] करणाऱ्यांची ४

اِنَّمَا تُوْعَدُوْنَ لَصَادِقٌ ۝٥
खचित्‌च तुम्हाशी जे वायदे केले जात आहेत, ते बिलकुल खरे आहेत ५

وَّاِنَّ الدِّيْنَ لَوَاقِعٌ ۝٦
आणि नि:संशय निर्णय होणारच आहे. ६

وَالسَّمَآءِ ذَاتِ الْحُبُكِ ۝٧
शपथ आहे मार्ग असलेल्या आकाशाची[५] ७

اِنَّكُمْ لَفِيْ قَوْلٍ مُّخْتَلِفٍ ۝٨
खचित्‌च तुम्ही भिन्न गोष्टीत पडला आहात.[६] ८

يُّؤْفَكُ عَنْهُ مَنْ اُفِكَ ۝٩
यापासून तोंच दूर ठेवला जातो[७] जो (यापासून) फिरवून दिला गेला असेल ९

قُتِلَ الْخَرّٰصُوْنَ ۝١٠
खोटे तर्क लढविणारे गारद करून टाकण्यात आले. १०

الَّذِيْنَ هُمْ فِيْ غَمْرَةٍ سَاهُوْنَ ۝١١
जे गफलतीत आणि भुललेले आहेत. ११

१) याच्याने अभिप्रेत वारे आहेत, जे मातीला उडवून पांगवून देतात.
२) 'विक्र' म्हणजे प्रत्येक ते ओझे, ज्यास कोणी सजीव घेऊन चालतो. पोटातील गर्भाने (गर्भिणींनी) अभिप्रेत ते वारे आहेत, जे ढगांना घेऊन आहेत. किंवा मग ते ढग आहेत, जे पाण्याचे ओझे उचलून आहेत. जसे चतुष्पाद गर्भाचे ओझे उचलत असतात.
३) 'जारियात' पाण्यांत चालणाऱ्या नावा. 'युसरन्' सहजतेने.
४) 'मुकस्सिमात' याच्याने अभिप्रेत ते देवदूत आहेत, जे कामांची वांटणी करुन घेतात. कोणी दयेचा देवदूत आहे, कोणी शिक्षेचा, कोणी पाण्याचा, तर कोणी सक्तीचा (म्हणजे दुष्काळाचा वगैरे) कोणी वाऱ्यांचा देवदूत आहे तर कोणी मृत्यु आणि आपत्तींचा. काहींनी या सर्वांपासून फक्त वारे अभिप्रेत घेतले आहेत आणि या सर्वांना वाऱ्याचे वैशिष्ट्य बनविले आहे. जसे विद्वान भाषांतरकार ने सुद्धा, याच्याप्रमाणे भाषांतर केले आहे. परंतु आम्ही इमाम इब्ने कसीर आणि इमान शौकानीच्या भाष्यानुसार स्पष्टीकरण केले आहे. शपथेने उद्देश्य, शपथ घेणाऱ्याच्या खरेपणाला वर्णन करणे असतो; किंवा काही वेळा फक्त ताकीद करण्याचा उद्देश्य असतो. आणि काही वेळेला शपथ घेणाऱ्याला प्रमाण म्हणून सादर करण्याचा उद्देश्य असतो. येथे शपथेचा हाच तिसरा प्रकार आहे. पुढे शपथेचे हे उत्तर सांगण्यांत आले आहे की, तुमच्याशी जे वायदे केले जातात, खचित्‌च ते खरे आहेत. आणि कयामत घडून येईल, ज्यांत न्यायनिवाडा केला जाईल. हे वाऱ्याचे चालणे, ढगांचे पाण्याला उचलणे, समुद्रांत गलबतांचे चालणे, आणि देवदुतांचे निरनिराळ्या कामांना पार पाडणे, कयामत घडून येण्यावर प्रमाण आहे. कारण की, जे व्यक्तित्व ही सर्व कामे करते, जे फारच कठीण, आणि संवयीच्या सबबीच्या विरुद्ध आहे. तेच व्यक्तित्व कयामतच्या दिवशी, सर्व मनुष्यांना दुसऱ्यांदा जिवंत पण करू शकते.
५) दुसरे भाषांतर रुप सौंदर्य आणि भूषण व सुंदरतेवाला असा केला गेला आहे. चंद्र, सूर्य, नक्षत्र व तारे, चमकदार तारे, त्याची उंची आणि विशालता, या सर्व वस्तू आकाशाची शोभा व भूषण आणि सौंदर्याला कारणीभूत आहेत.
६) म्हणजे हे मक्केवाल्यांनो ! तुमची कोण्या गोष्टीत, आपसात एकवाक्यता नाही. आमच्या पैगंबराला तुमच्यातून कोणी जादूगीर, कोणी कवी, कोणी तांत्रिक कोणी खोटे म्हणतो. अशाच प्रकारे कोणी कयामतला बिलकुल्‌च मानीत नाही, कोणी याच्यांत संशय घेतो. याशिवाय एकीकडे अल्लाहला निर्माणकर्ता आणि रोजी देणारा म्हणून मान्य करतात. दुसरीकडे दुसऱ्यांना पण उपास्य बनवून ठेवले आहे.
७) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर ईमान आणण्याने, किंवा सत्त्याने म्हणजे मेल्यानंतर पुन्हा उठणे व एकेश्वरवाद किंवा अर्थ आहे, चर्चित मतभेदाने तो मनुष्य फिरवून दिला गेला, ज्याला अल्लाहने आपल्या मर्जीने फिरवून दिले. पहिल्या भावार्थांत निंदा आहे दुसऱ्यांत प्रशंसा.

يَسْـَٔلُوْنَ اَيَّانَ يَوْمُ الدِّيْنِ ﴿١٢﴾

विचारतात की निर्णयाचा दिवस केव्हा होईल? (१२)

يَوْمَ هُمْ عَلَى النَّارِ يُفْتَنُوْنَ ﴿١٣﴾

होय! हा तो दिवस आहे की हे अग्नीवर होरपळले जातील.[१] (१३)

ذُوْقُوْا فِتْنَتَكُمْ ۭ هٰذَا الَّذِيْ كُنْتُمْ بِهٖ تَسْتَعْجِلُوْنَ ﴿١٤﴾

आपल्या शिक्षेची गोडी चाखा;[२] हीच तर आहे, जिच्याकरीता तुम्ही घाई करीत होता. (१४)

اِنَّ الْمُتَّقِيْنَ فِيْ جَنّٰتٍ وَّعُيُوْنٍ ﴿١٥﴾

नि:संशय (अल्लाहला) भिऊन वागणारे लोक स्वर्गांमध्ये आणि झऱ्यांमध्ये असतील. (१५)

اٰخِذِيْنَ مَآ اٰتٰىهُمْ رَبُّهُمْ ۭ اِنَّهُمْ كَانُوْا قَبْلَ ذٰلِكَ مُحْسِنِيْنَ ﴿١٦﴾

त्यांच्या पालनकर्त्याने जे काही त्यांना दिले आहे, ते घेत असतील, ते तर ह्याच्यापूर्वीच सदाचरणी होते. (१६)

كَانُوْا قَلِيْلًا مِّنَ الَّيْلِ مَا يَهْجَعُوْنَ ﴿١٧﴾

ते रात्री फारच थोडा वेळ झोपत असत.[३] (१७)

وَبِالْاَسْحَارِ هُمْ يَسْتَغْفِرُوْنَ ﴿١٨﴾

आणि पहाटे (सहेरींच्या वेळी) क्षमा याचना मागीत असत.[४] (१८)

وَفِيْٓ اَمْوَالِهِمْ حَقٌّ لِّلسَّاۗىِٕلِ وَالْمَحْرُوْمِ ﴿١٩﴾

आणि त्यांच्या धनसंपत्तीत मागणारा, आणि गरजवंत असून सुद्धा मागण्यापासून स्वत:ला वाचवणाऱ्यांचा हक्क होता.[५] (१९)

وَفِي الْاَرْضِ اٰيٰتٌ لِّلْمُوْقِنِيْنَ ﴿٢٠﴾

आणि विश्वासूंसाठी पृथ्वीत बऱ्याच निशाण्या आहेत. (२०)

وَفِيْٓ اَنْفُسِكُمْ ۭ اَفَلَا تُبْصِرُوْنَ ﴿٢١﴾

आणि खुद्द तुमच्या पिंडातही, तर काय तुम्ही पाहत नाही? (२१)

وَفِي السَّمَاۗءِ رِزْقُكُمْ وَمَا تُوْعَدُوْنَ ﴿٢٢﴾

आणि तुमची अन्नसंपदा, आणि जे तुम्हांस वचन दिले जात आहे, सर्व आकाशांत आहे.[६] (२२)

فَوَرَبِّ السَّمَاۗءِ وَالْاَرْضِ اِنَّهٗ لَحَقٌّ مِّثْلَ مَآ اَنَّكُمْ تَنْطِقُوْنَ ﴿٢٣﴾ ع ١ ٢٣ ١٨

१ २३ १८ आकाश आणि पृथ्वीच्या पालनकर्त्याची शपथ! की,[७] हे बिल्कुल सत्य आहे, असेच जशा तुम्ही गोष्टी करतात. (२३)

هَلْ اَتٰىكَ حَدِيْثُ ضَيْفِ اِبْرٰهِيْمَ الْمُكْرَمِيْنَ ﴿٢٤﴾ منزل ٧

काय तुला इब्राहीमच्या सन्माननीय पाहुण्यांची बातमी पण पोहचली आहे![८] (२४)

اِذْ دَخَلُوْا عَلَيْهِ فَقَالُوْا سَلٰمًا ۭ قَالَ سَلٰمٌ ۚ قَوْمٌ مُّنْكَرُوْنَ ﴿٢٥﴾

ते जेव्हा त्यांच्याजवळ आले, तेव्हा सलाम केला. इब्राहीमने सलामचा जवाब दिला. (आणि म्हटले हे तर) अनोळखी लोक आहेत.[९] (२५)

فَرَاغَ اِلٰٓى اَهْلِهٖ فَجَاۗءَ بِعِجْلٍ سَمِيْنٍ ﴿٢٦﴾

मग (गुपचूप लवकर लवकर) आपल्या कुटुंबाकडे गेले आणि एक गुबगुबीत वासरु (मांस) आणले. (२६)

فَقَرَّبَهٗٓ اِلَيْهِمْ قَالَ اَلَا تَاْكُلُوْنَ ﴿٢٧﴾

आणि त्याला त्यांच्या समोर ठेवले; आणि विचारले आपण खात का नाही?[१०] (२७)

فَاَوْجَسَ مِنْهُمْ خِيْفَةً ۭ قَالُوْا لَا تَخَفْ ۭ وَبَشَّرُوْهُ بِغُلٰمٍ عَلِيْمٍ ﴿٢٨﴾

मग तर मनातल्या मनांत त्यांच्याशी भिऊन गेले;[११] ते म्हणाले, आपण (कोण्या तऱ्हेचे) भय बाळगू नका;[१२] आणि त्यांनी (हजरत इब्राहीमला) एका शहाण्या सुरत्या मुलाच्या जन्मण्याचे शुभवर्तमान दिले. (२८)

فَاَقْبَلَتِ امْرَاَتُهٗ فِيْ صَرَّةٍ فَصَكَّتْ وَجْهَهَا وَقَالَتْ عَجُوْزٌ عَقِيْمٌ ﴿٢٩﴾

तेव्हा त्यांच्या पत्नीने आश्चर्याने[१३] आपल्या तोंडावर हात मारून म्हटले की, मी तर म्हातारी आहे आणि त्याबरोबरच वांझ (२९)

قَالُوْا كَذٰلِكِ ۙ قَالَ رَبُّكِ ۭ اِنَّهٗ هُوَ الْحَكِيْمُ الْعَلِيْمُ ﴿٣٠﴾

त्यांनी म्हटले तुझ्या पालनकर्त्याने असेच फर्माविले आहे. नि:संशय तो बुद्धीमान आणि सर्वज्ञानी आहे.[१४] (३०)

१) ज्याप्रमाणे सोन्याला अग्नीत टाकून पारखले जाते, अशाच प्रकारे हे अग्नीत टाकले जातील.

२) 'फितनह' शिक्षा किंवा आगीत जळण्याच्या अर्थांत.

३) 'हुजुअ' चा अर्थ आहे, रात्री झोपणे 'मा यह्जऊन' मध्ये 'मा' ताकीदचा आहे. ते रात्री कमी झोपत असत. अर्थ आहे

संपूर्ण रात्र झोपून, गफलत आणि विलासात, घालवून देत नसत. किंबहुना रात्रीचा काही भाग अल्लाहच्या स्मरणांत आणि त्याच्या समोर काकुळतीला येऊन, घालवत असत. जशी की हदीसमध्ये सुद्धा, रात्रीच्या (अल्लाह समोर) उभे रहाण्याची ताकीद आहे. उदाहरणार्थ एका हदीसमध्ये फर्माविले, ''लोकांनो! लोकांना जेवण द्या, नातेवाईकांशी सद्वर्तन करा, सलामला पसरवा, आणि रात्री उठून नमाज पढा, जेव्हा की लोक झोपलेले असतील. तुम्ही सुखासमाधानाने स्वर्गांत दाखल होऊन जाल.'' (मुसनद अहमद ५/४५१)

४) प्रात:काल दुआंच्या कबूल होण्याचा उत्तम वेळांमधून आहे. हदीस मध्ये येते की, ''जेव्हा रात्रीचा शेवट एक तृतियांश भाग बाकी राहून जातो, तेव्हाअल्लाहतआला जगाच्या आकाशावर अवतीर्ण होतो आणि आवाज देतो की, कोणी तौबा करणारा आहे की, मी त्याची तौबा कबूल करावी? कोणी क्षमा मागणारा आहे की, मी त्याला क्षमा करू? कोणी मागणारा आहे की, मी त्याची मागणी पूर्ण करू? येथ पावेतो की, सकाळ उजाडते'' (स.मुस्लिम)

५) महरूमने अभिप्रेत तो गरजवंत आहे, जो मागण्यापासून स्वत:ला वाचवितो म्हणून सत्पात्री असून सुद्धा लोक त्याला देत नाहीत. किंवा तो मनुष्य आहे ज्याचे सर्व काही नैसर्गिक आपत्तीत नष्ट होऊन जावे.

६) म्हणजे पाऊस पण आकाशातून पडतो, ज्याने तुमचे खाद्यान्न निर्माण होते. आणि स्वर्ग आणि नर्क पुण्यप्रतिफळ आणि शिक्षा, पण आकाशांत आहे, ज्यांचा वायदा केला जात आहे.

७) इन्नहु मध्ये जमीरचा मर्जा (हे) ते आदेश आणि महावाक्ये आहेत ज्या चर्चिल्या गेल्या.

८) 'हल्' लक्ष वेधण्यासाठी आहे. ज्यात नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला ही तंबी आहे की, या गोष्टीचे तुला ज्ञान नाही. किंबहुना आम्ही तुला वह्यामार्फत माहित करीत आहोत.

९) हे आपल्या मनांत म्हटले, त्यांना संबोधित करून नाही.

१०) म्हणजे समोर ठेवून सुद्धा, त्यांनी खाण्या करीता हातच उचलला नाही, तेव्हा विचारले.

११) भीती यासाठी वाटली की, ह.इब्राहीम عليه السلام ला वाटले की हे जेवण करीत नाही त्या अर्थी हे येणारे चांगल्या इराद्याने नाही, किंबहुना वाईट इराद्याने आले आहेत.

१२) ह.इब्राहीम عليه السلام च्या चेहऱ्यावर भीतीची चिन्हे पाहून, देवदूतांनी म्हटले.

१३) 'सर्रतिन्' चा दुसरा अर्थ आहे, आरडाओरडा म्हणजे ओरडून सांगितले.

१४) म्हणजे ज्याप्रमाणे आम्ही तुला सांगितले आहे. हे आम्ही आपल्याकडून सांगितले नाही. किंबहुना तुझ्या पालनकर्त्याने अशा प्रकारे म्हटले आहे. ज्याची आम्ही तुला सूचना देत आहोत. म्हणून याच्यावर न आश्चर्य वाटण्याची आवश्यकता आहे, न शंका घेण्याची. या करीतांकी अल्लाह जे इच्छितो, ते अवश्य होऊन राहते.

(हजरत इब्राहिम अ.) ने विचारले, अल्लाहच्या पाठविलेल्या (देवदूतांनो!) तुमचा काय उद्देश्य आहे?[१] ३१

قَالَ فَمَا خَطْبُكُمْ أَيُّهَا الْمُرْسَلُونَ ﴿٣١﴾

त्यांनी उत्तर दिले की, आम्ही गुन्हेगार लोकांकडे पाठविले गेलो आहोत.[२] ३२

قَالُوٓا۟ إِنَّآ أُرْسِلْنَآ إِلَىٰ قَوْمٍ مُّجْرِمِينَ ﴿٣٢﴾

कीं आम्ही त्यांच्यावर खड्यांचा वर्षाव करावा.[३] ३३

لِنُرْسِلَ عَلَيْهِمْ حِجَارَةً مِّن طِينٍ ﴿٣٣﴾

जे तुझ्या पालनकर्त्याकडून, या मर्यादेबाहेर निघून गेलेल्यांसाठी नामनिर्दिष्ट होऊन चुकले आहेत.[४] ३४

مُّسَوَّمَةً عِندَ رَبِّكَ لِلْمُسْرِفِينَ ﴿٣٤﴾

तर जेवढे तेथे ईमानदार होते, आम्ही त्यांना काढून घेतले.[५] ३५

فَأَخْرَجْنَا مَن كَانَ فِيهَا مِنَ الْمُؤْمِنِينَ ﴿٣٥﴾

आणि आम्हाला तेथे मुसलमानांचे फक्त एकच घर आढळले.[६] ३६

فَمَا وَجَدْنَا فِيهَا غَيْرَ بَيْتٍ مِّنَ الْمُسْلِمِينَ ﴿٣٦﴾

१) खत्‌बुन, शान, किस्सा म्हणजे या शुभवर्तमानाशिवाय तुमचे आणखी काय काम आणि उद्देश्य आहे, ज्यासाठी तुम्हास पाठविण्यात आले आहे?

२) याच्याने अभिप्रेत लूतचे लोक आहेत. ज्यांचा सर्वांत मोठा अपराध समलिंगी संभोग होता.

३) वर्षाव करावयाचा अर्थ, या खड्यांनी त्यांना धोंडमार करावी हे खडे निव्वळ दगडाचे होते. आकाशातून पडणाऱ्या गारा नव्हत्या किंबहुना मातीपासून बनलेले होते.

४) 'मुसव्वमतन' (नामनिर्दिष्ट किंवा खुणा केलेले ) त्यांची विशेष ओळख होती, ज्यामुळे त्यांना ओळखून घेण्यात येत होते. किंवा ते शिक्षे करिता खास होते. काही म्हणतात कीं,ज्या खड्यामुळे ज्याचा मृत्यू होणार होता, त्यावर त्याचे नाव लिहिलेले असे 'मुसरिफीन' जे शिर्क आणि अज्ञानात फार पुढे गलेले आणि कुकृत्यांत मर्यादेच्या बाहेर निघून गेले आहेत.

५) म्हणजे शिक्षा येण्याच्या पूर्वी, आम्ही त्यानां तेथून निघून जाण्याचा हुकूम दिला होता; की त्यांनी शिक्षेपासून सुरक्षित रहावे.

६) आणि हे अल्लाहचे पैगंबर ह. लूत عليه السلام चे घर होते; ज्यांत त्यांच्या दोन मुली, आणि काही त्यांच्यावर ईमान आणणारे होते. असे म्हणतात कीं एकूण तेरा लोक होते. यांच्यात ह.लूत عليه السلام ची पत्नी सामील नव्हती किंबहुना ती आपल्या लोकांबरोबर शिक्षेमध्ये नष्ट होणाऱ्यामधून होती. (अयसरुत तफासीर) इस्लामचा अर्थ आहे, आज्ञापालन आणि हुकुमापुढे शिर नमविणारा, अल्लाहच्या हुकूमावर आमापालनात शिर झुकविणारा मुस्लिम आहे. या अनुषंगाने प्रत्येक ईमानवाला मुसलमान आहे. म्हणूनच पहिले त्यांच्या साठी ईमानवाल्यांचा शब्द उपयोगांत आणला मग त्यांच्याच करीता मुस्लिम शब्द बोलला गेला. याच्याने आधार घेतला गेला आहे कीं, या उपाधीत काही फरक नाही जसे की काही लोक मोमिन आणि मुस्लिमच्या दर्म्यान फरक करतात. कुरआनने जेथे कोठे मोमिन आणि कोठे मुस्लिमचा शब्द उपयोगात आणला आहे, तर तो त्या अर्थाच्या अनुषंगाने आहे. जो अरबी शब्द कोषाच्या अनुषंगाने, त्याच्या दर्म्यान आहे. म्हणून शब्दकोषीय उपयोगाच्या तुलनेत, धर्मशास्त्राच्या वास्तविकतेचा दृष्टीकोन जास्त आवश्यक आहे. आणि धर्मशास्त्राच्या वास्तविकतेच्या अनुषंगाने यांच्या दर्म्यान फक्त तोच फरक आहे, जो जिब्रईलच्या हदीसने सिध्द आहे. जेव्हा नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला विचारण्यांत आले कीं, इस्लाम काय आहे? तेव्हा आपण फर्माविले, ''लाइलाहा इल्लल्लाह्'' ची साक्ष, नमाजचे कायम करणे, जकात अदा करणे, हज्ज, आणि रमजानचे उपवास.''आणि जेव्हा ईमानच्या बाबतीत विचारले गेले तेव्हा फर्माविले, ''अल्लाह्वर ईमान आणणे, त्याचे देवदूत, पुस्तके, पैगंबर, आणि दैवा (भले किंवा वाईट, अल्लाहकडून होणे) वर ईमान ठेवणे.'' म्हणजे मनापासून या गोष्टींवर विश्वास ठेवणे आणि हुकूमांचे आणि फर्जचे अदा करणे इस्लाम आहे. या अनुषंगाने प्रत्येक मोमिन, मुसलमान आणि प्रत्येक मुसलमान मोमिन आहे. (फत्हुल कदीर) आणि जे मोमिन आणि मुस्लिम दर्म्यान फरक करतात, ते म्हणतात कीं, हे ठीक आहे कीं येथे कुरआनाने एकाच समुदायाकरिता मोमिन आणि मुस्लीमचे शब्द वापरले आहेत. परंतु यांच्या दर्म्यान जो फरक आहे, त्याच्या अनुषंगाने प्रत्येक मोमिन, मुसलमान पण आहे. परंतु प्रत्येक मुस्लिमाचे मोमीन होणे जरूरी नाही. (इब्ने कसीर) तथापि हा एक ज्ञानी वादविवाद आहे. उभय पक्षांजवळ आपल्या आपल्या म्हणण्याच्या पृष्ठर्थ, आधाराकरीता प्रमाण उपलब्ध आहेत.

وَتَرَكْنَا فِيهَا آيَةً لِلَّذِينَ يَخَافُونَ الْعَذَابَ الْأَلِيمَ ﴿٣٧﴾

**आणि तेथे आम्ही, त्यांच्याकरीता जे दु:खप्रद शिक्षेचे भय बाळगतात, एक (पूर्ण) निशाणी सोडली.[१] ३७**

وَفِي مُوسَىٰ إِذْ أَرْسَلْنَاهُ إِلَىٰ فِرْعَوْنَ بِسُلْطَانٍ مُبِينٍ ﴿٣٨﴾

**आणि मूसाच्या वृत्तांत सुध्दा, (आमच्याकडून तंबी आहे की), आम्ही त्याला फिरऔनकडे स्पष्ट प्रमाण देऊन पाठविले. ३८**

فَتَوَلَّىٰ بِرُكْنِهِ وَقَالَ سَاحِرٌ أَوْ مَجْنُونٌ ﴿٣٩﴾

**तेव्हा त्याने आपल्या सेनेच्या जोरावर तोंड फिरविले;[२] आणि म्हणू लागला, हा जादूगार आहे किंवा वेडा आहे. ३९**

فَأَخَذْنَاهُ وَجُنُودَهُ فَنَبَذْنَاهُمْ فِي الْيَمِّ وَهُوَ مُلِيمٌ ﴿٤٠﴾

**सरशेवटी आम्ही त्याला आणि त्याच्या सैन्याला शिक्षेत धरून समुद्रात टाकून दिले आणि तो होताच निंदनीय![३] ४०**

وَفِي عَادٍ إِذْ أَرْسَلْنَا عَلَيْهِمُ الرِّيحَ الْعَقِيمَ ﴿٤١﴾

**अशाचप्रकारे 'आद' मध्ये सुध्दा[४] (आमच्याकडून तंबी आहे) जेव्हा की आम्ही त्यांच्यावर निरोपयोगी वावटळ पाठविली.[५] ४१**

مَا تَذَرُ مِنْ شَيْءٍ أَتَتْ عَلَيْهِ إِلَّا جَعَلَتْهُ كَالرَّمِيمِ ﴿٤٢﴾

**ती ज्या ज्या वस्तुंवरून पसार होत असे तिला जीर्ण हाडांप्रमाणे (चुराडा) करून टाकीत होती.[६] ४२**

وَفِي ثَمُودَ إِذْ قِيلَ لَهُمْ تَمَتَّعُوا حَتَّىٰ حِينٍ ﴿٤٣﴾

**आणि समूद च्या वृत्तांत सुध्दा (एक धडा) आहे. जेव्हा त्यांना सांगण्यात आले की, तुम्ही काही दिवसांपर्यंत सुखोपभोग घेऊन घ्या.[७] ४३**

فَعَتَوْا عَنْ أَمْرِ رَبِّهِمْ فَأَخَذَتْهُمُ الصَّاعِقَةُ وَهُمْ يَنْظُرُونَ ﴿٤٤﴾

**परंतु त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या हुकुमाकडून तोंड फिरविले, ज्यावर त्यांना त्यांच्या पाहता पाहता (एका भयंकर) गर्जनेने[८] येऊन गारद करून टाकले ४४**

فَمَا اسْتَطَاعُوا مِنْ قِيَامٍ وَمَا كَانُوا مُنْتَصِرِينَ ﴿٤٥﴾

**तर न ते उभे राहू शकले,[९] आणि न बदला घेऊ शकले[१०] ४५**

१) ही निशाणी किंवा पूर्ण चिन्ह, त्या शिक्षेच्या खुणा आहेत, ज्या या नष्ट झालेल्या वस्त्यांमध्ये बऱ्याच काळापर्यंत बाकी राहिल्यात आणि हे चिन्ह पण त्यांच्याच करितांआहे, जे अल्लाह्च्या शिक्षेला भिणारे आहेत. कारण प्रवचन आणि उपदेशाचा परिणाम पण तेच घेतात, आणि निशाण्यांमध्ये चिंतन आणि मनन पण तेच करतात.

२) शक्ती सामर्थ्याला रुक्न म्हणतात. हे येथे अभिप्रेत त्याची आपली शक्ती आणि सैन्य आहे.

३) म्हणजे त्याची कामेच अशी होती कीं, ज्यावर तो उपहासाला पात्र होता.

४) 'आद'च्या वृत्तांतातपण आम्ही निशाणी सोडून दिली.

५) अल्रीहल् अकीम (वांझ असावी) ज्यांत चांगले आणि बरकत नव्हती ते वारे वृक्षांना, मुळापासून उखडून टाकणारे होते. पावसाचे शुभवर्तमान देणारे नव्हते. किंबहुना फक्त गारद करणारे आणि शिक्षा देणारे वारे होते.

६) हा त्या वाऱ्यांचा परिणाम होता, जे 'आद' च्या लोकांवर शिक्षा म्हणून पाठविण्यात आले होते. हे चक्री आणि सोसाट्याचे वारें, सात रात्री, आणि आठ दिवस सतत वाहत राहिले. (सू.अल्हाक्का-७)

७) म्हणजे जेव्हा त्यांनी आपणच मागणी केलेल्या चमत्काराने निर्माण झालेल्या उंटणीला ठार करून टाकले, तेव्हा त्यांना सांगून देण्यात आले कीं, आता तीन दिवस आणखी दुनियेची मौज मजा लुटून घ्या. तीन दिवसांनतर तुम्ही गारद करून टाकले जाल. हा याचकडे इशारा आहे. काहींनी याला ह.सॉलेह عليه السلام च्या पैगंबरीच्या सुरवातीचे म्हणणे ठरविले आहे. शब्द याच भावार्थाला सुध्दा पुष्टी देतात. किंबहुना विषयाच्या अनुषंगाने हाच अर्थ जास्त जवळचा आहे.

८) हा 'साइका' (गर्जना) आकाशी आरोळी होती. आणि याच्या बरोबर खालून भूकंप होता जसे कीं, सू आअ्राफ-७८ मध्ये आहे.

९) त्यांची काय बिशाद! कीं, त्यांनी पळून जाऊ शकावे !!

१०) म्हणजे अल्लाह्च्या शिक्षेकडून, आपल्या स्वत:ला वाचवूशकले नाहीं.

وَقَوْمَ نُوحٍ مِّن قَبْلُ ۖ إِنَّهُمْ كَانُوا قَوْمًا فَاسِقِينَ ﴿٤٦﴾

आणि नूहच्या लोकांचा सुध्दा याच्यापूर्वीच, (हीच स्थिती होऊन चुकली होती); ते पण फारच आज्ञाभंजक लोक होते.[१] ४६

وَالسَّمَاءَ بَنَيْنَاهَا بِأَيْدٍ وَإِنَّا لَمُوسِعُونَ ﴿٤٧﴾

आकाशाला आम्ही (आपल्या) हातांनी बनविले आहे. आणि खचित्‌च आम्ही विशाल सामर्थ्य बाळगतो.[२] ४७

وَالْأَرْضَ فَرَشْنَاهَا فَنِعْمَ الْمَاهِدُونَ ﴿٤٨﴾

आणि पृथ्वीला आम्ही आंथरूण बनवून[३] दिले आहे तर आम्ही किती चांगले बनवून देणारे आहोत. ४८

وَمِن كُلِّ شَيْءٍ خَلَقْنَا زَوْجَيْنِ لَعَلَّكُمْ تَذَكَّرُونَ ﴿٤٩﴾

आणि प्रत्येक वस्तुंला आम्ही जोडी जोडी बनवून दिले आहे.[४] कीं कदाचित्‌ तुम्ही बोध घ्याल[५] ४९

فَفِرُّوا إِلَى اللَّهِ ۖ إِنِّي لَكُم مِّنْهُ نَذِيرٌ مُّبِينٌ ﴿٥٠﴾

तर तुम्ही अल्लाहकडे पळा[६] (म्हणजे त्याच्याकडे वळा), खचित्‌च मी तुम्हास त्याच्याकडून स्पष्टपणे भय सुचविणारा आहे. ५०

وَلَا تَجْعَلُوا مَعَ اللَّهِ إِلَٰهًا آخَرَ ۖ إِنِّي لَكُم مِّنْهُ نَذِيرٌ مُّبِينٌ ﴿٥١﴾

आणि अल्लाहच्या बरोबर आणखी कोणास उपास्य ठरवू नका नि:संशय मी तुम्हास त्याच्याकडून स्पष्टपणे भय दाखविणारा आहे.[७] ५१

كَذَٰلِكَ مَا أَتَى الَّذِينَ مِن قَبْلِهِم مِّن رَّسُولٍ إِلَّا قَالُوا سَاحِرٌ أَوْ مَجْنُونٌ ﴿٥٢﴾

अशाचप्रकारे जे लोक यांच्यापूर्वी होऊन चुकले आहेत, त्यांच्याजवळ जो पण पैगंबर आला, त्यांनी सांगून टाकले कीं, एक तर हा जादूगार आहे किंवा वेडा आहे. ५२

أَتَوَاصَوْا بِهِ ۚ بَلْ هُمْ قَوْمٌ طَاغُونَ ﴿٥٣﴾

का हे (लोक) या गोष्टीची एक दुसऱ्याला ताकीद करीत आले आहेत?[८] (नाही), किंबहुना हे सर्वच्या सर्व शिरजोर आहेत.[९] ५३

فَتَوَلَّ عَنْهُمْ فَمَا أَنتَ بِمَلُومٍ ﴿٥٤﴾

तर आपण त्यांच्याकडून तोंड फिरवून घ्यावे; आपल्यावर काहीही दोष नाही. ५४

وَذَكِّرْ فَإِنَّ الذِّكْرَىٰ تَنفَعُ الْمُؤْمِنِينَ ﴿٥٥﴾

आणि उपदेश करीत रहा, खचित्‌च हा उपदेश ईमानवल्यांना फायदा देईल.[१०] ५५

وَمَا خَلَقْتُ الْجِنَّ وَالْإِنسَ إِلَّا لِيَعْبُدُونِ ﴿٥٦﴾

मी जिन्नांत आणि मनुष्यांना केवळ यासाठी निर्माण केले आहे कीं, त्यांनी फक्त माझी(च) उपासना करावी.[११] ५६

مَا أُرِيدُ مِنْهُم مِّن رِّزْقٍ وَمَا أُرِيدُ أَن يُطْعِمُونِ ﴿٥٧﴾

न मी त्यांच्या पासून अन्नसंपत्तीची अपेक्षा करतो; न माझी ही अपेक्षा आहे की, यांनी मला खाऊ (पिऊ) घालावे.[१२] ५७

إِنَّ اللَّهَ هُوَ الرَّزَّاقُ ذُو الْقُوَّةِ الْمَتِينُ ﴿٥٨﴾

अल्लाह्‌ तर स्वत:च सर्वांचा अन्नदाता, जबरदस्त आणि बलवंत आहे. ५८

فَإِنَّ لِلَّذِينَ ظَلَمُوا ذَنُوبًا مِّثْلَ ذَنُوبِ أَصْحَابِهِمْ فَلَا يَسْتَعْجِلُونِ ﴿٥٩﴾

तर ज्या लोकांनी जुलूम केला आहे, त्यांना पण त्यांच्या साथीदारांच्या हिश्श्यासारखा हिस्सा मिळेल;[१३] म्हणून त्यांनी मजजवळ घाई करू नये.[१४] ५९

فَوَيْلٌ لِّلَّذِينَ كَفَرُوا مِن يَوْمِهِمُ الَّذِي يُوعَدُونَ ﴿٦٠﴾

तर बरबादी आहे त्या लोकांसाठी ज्यांनी त्या दिवसाला नाकारले ज्याचा त्यांच्याशी वायदा केला जात आहे. ६०

१) नूहचे लोक, आद, फिरऔन आणि समूद वगैरेंच्या फार पूर्वी होऊन चुकले आहेत. त्यांनी पण अल्लाहच्या आज्ञापालना ऐवजी त्याच्याशी बंडखोरीचा मार्ग अनुसरला होता. सरशेवटी त्यांना जलप्रलयात बुडवून देण्यांत आले.

२) म्हणजे आकाश पहिलेच फार विशाल आहे. परंतु आम्ही याला, याच्यापेक्षा सुध्दा जास्त विशाल करण्याचे सामर्थ्य बाळगतो. किंवा आकाशातून पाऊस पाडून, अन्नसंपत्ती भरपूर करून देण्याचे सामर्थ्य बाळगतो. किंवा मुसेऊन ला उसवून म्हणण्यात येईल (शक्ती आणि सामर्थ्य बाळगणारा) तर अर्थ होईल कीं आमच्यात या सारखे आणखी आकाश

बनविण्याचे पण शक्ती आणि सामर्थ्य आहे. आम्ही आकाश आणि पृथ्वी बनवून थकलो नाही. किंबहुना आमच्या शक्ती सामर्थ्याला काही सिमाच नाही.
३) म्हणजे बिछाईती सारखे त्याला अंथरून दिले आहे.
४) म्हणजे प्रत्येक वस्तुला जोडी जोडी, नर आणि मादी, किंवा तिच्या सारखी आणि तिच्या विरूध्द, पण निर्माण केली. जसे प्रकाश आणि अंधार, कोरडे आणि ओले, चंद्र आणि सूर्य, गोड आणि कडूं, रात्र आणि दिवस, चांगले आणि वाईट, जीवन आणि मृत्यू, ईमान आणि कुफ्र, शंका आणि समाधान, (सुदैव आणि दुर्दैव) स्वर्ग आणि नर्क, मनुष्य आणि जिन्न वगैरे येथपावेतो की सजीवच्या विरूध्द निर्जीव, यासाठी आवश्यकता आहे कीं या जगाची पण जोडी असावी, म्हणजे परलोक, इहलोकाच्या मुकाल्यांत दुसरे जीवन.
५) हे लक्षांत ठेवा सर्वांना निर्माण करणारा फक्त एक अल्लाह आहे. त्याचा कोणी सरकतदार नाही.
६) म्हणजे कुफ्र आणि गुन्हयांपासून तौबा करून, ताबडतोब अल्लाह्च्या समोर झुकून जा. यात उशीर करू नका.
७) म्हणजे तुम्हास उघड उघड भिववित आहे, आणि तुमचे भले इच्छितो कीं फक्त एका अल्लाह्कडे वळां त्याच्यावरच भरोसा आणि विश्वास ठेवा आणि फक्त त्याचीच उपासना करा. त्याच्याबरोबर दुसऱ्या उपास्यांना शामील करू नका. असे कराल तर लक्षात ठेवा! स्वर्गाच्या देणग्यांपासून नेहमीकरता वंचित् होऊन जाल.
८) म्हणजे प्रत्येक मागून येणाऱ्या समूहाने, पैगंबरांना खोटे ठरविले आणि त्यांना जादूगार आणि वेडा ठरविले; जशा मागील समूह, नंतर येणाऱ्या समूहांना ताकीद करून जात राहिल्या आहेत. एकानंतर दुसऱ्या प्रत्येक समूहाने हाच नाकारण्याचा मार्ग अनुसरला.
९) म्हणजे एक दुसऱ्याला उपदेश तर केले नाही, परंतु प्रत्येक समूहच आपल्या जागी शिरजोर आहे. म्हणून त्या सर्वांची अंत:करणे सुध्दा एक दुसऱ्यांशी मिळती जुळती आहेत. आणि त्यांचे व्यवहार आणि वागणूक पण मिळते जुळते आहे. म्हणून मागून येणाऱ्यांनी सुध्दा, तेच काही केले आणि सांगितले, जे पूर्वीच्या लोकांनी सांगितले आणि केले.
१०) यासाठी कीं उपदेशाने फायदा त्यांनाच पोहचतो. किंवा अर्थ आहे कीं, आपण उपदेश करीत रहा. या उपदेशाने ते लोक खचित्च फायदा उठवतील. ज्यांच्या बाबतीत अल्लाह्च्या ज्ञानात आहे कीं, ते ईमान आणतील.
११) यांच्यात अल्लाह्तआलाच्या त्या शास्त्रीय इराद्याचे जाहीर करणे आहे. जो त्याला प्रिय आणि वांछित आहे की सर्व मनुष्यांनी आणि जिन्नातांनी फक्त एका अल्लाहची इबादत करावी; आणि आज्ञापालन पण त्याच एकाचे करावे जर याचा संबंध अल्लाह्च्या स्वाभाविक इराद्याशी असता, तर कोण्या मनुष्यआणि जिन्नाने अल्लाह्च्या उपासना आणि आज्ञापालनापासून पळ काढण्याचे सामर्थ्यच बाळगले नसते.म्हणजे याच्यांत मनुष्ये आणि जिन्नातांना, त्या जीवनाच्या उद्देश्याची आठवण करून देण्यात आली आहे, ज्याला जर ते विसरून गेले, तर परलोकांत सक्त विचारपूस होईल, आणि ते या परीक्षेत अयशस्वी ठरविले जातील. ज्यात अल्लाह्ने त्यांना विचार स्वातंत्र्य बहाल करून टाकले आहे.
१२) म्हणजे माझ्या उपासना आणि आज्ञापालनाने माझा उद्देश्य हा नाही कीं, यांनी मला कमवून खाऊ घालावे, जसा कीं दुसऱ्या धन्यांचा उद्देश्य असतो. किंबहुना अन्नसंपतीचे सर्व खजीने तर खुद्द माझ्याच जवळ आहेत. माझ्या उपासना आणि आज्ञापालनाचा तर खुद्द त्यांनाच फायदा होईल त्यांचा परलोक सुधारून जाईल, मला काही फायदा होणार नाही.
१३) 'जनूब' चा अर्थ बादलीचा आहे. विहीरीतून बादलीने पाणी काढून वाटले जाते. या अनुषंगाने येथे बादलीला हिश्श्याच्या अर्थांत उपयोगांत आणले गेले आहे. अर्थ आहे की जालीमाला शिक्षेतून हिस्सा मिळेल. ज्याप्रमाणे याच्यापूर्वी कुफ्र आणि शिर्क करणाऱ्यांना, त्यांच्या शिक्षेचा हिस्सा मिळाला होता.
१४) परंतु हा शिक्षेचा हिस्सा त्यांना केव्हा मिळेल, हे अल्लाह्च्या मर्जीवर अवलंबून आहे. म्हणून शिक्षेच्या मागणीत घाई करू नये.

آياتها ۴۹ (۵۲) سُوْرَةُ الطُّوْرِ مَكِّيَّةٌ (۷۶) رُكوعاتها ۲

महावाक्ये ४९ | **(५२) सू. तूर** | रुकूअ २

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ ○

**परम दयाळू आणि कृपाळू**
**अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

وَالطُّوْرِ ۙ ①
**'तूर' ची शपथ[१] ①**

وَكِتٰبٍ مَّسْطُوْرٍ ۙ ②
**आणि लिहिलेल्या पुस्तकाची[२] ②**

فِيْ رَقٍّ مَّنْشُوْرٍ ۙ ③
**जे उघड्या पानात आहे.[३] ③**

وَّالْبَيْتِ الْمَعْمُوْرِ ۙ ④
**आणि आबाद घराची[४] ④**

وَالسَّقْفِ الْمَرْفُوْعِ ۙ ⑤
**आणि उंच छताची[५] ⑤**

وَالْبَحْرِ الْمَسْجُوْرِ ۙ ⑥
**आणि भडकलेल्या समुद्राची[६] ⑥**

اِنَّ عَذَابَ رَبِّكَ لَوَاقِعٌ ۙ ⑦
**नि:संशय तुमच्या पालनकर्त्याची शिक्षा होऊनच राहणार आहे. ⑦**

مَّا لَهٗ مِنْ دَافِعٍ ۙ ⑧
**तिला कोणी अडवूंशकणार नाहीं.[७] ⑧**

يَّوْمَ تَمُوْرُ السَّمَآءُ مَوْرًا ۙ ⑨
**ज्या दिवशी आकाश थर थर कापू लागेल.[८] ⑨**

१) तूर तो पर्वत आहे, ज्यावर ह. मूसा عليه السلام नी अल्लाह्शी संभाषण केले. त्याला तूरे सय्ना पण म्हणण्यात येते. अल्लाह्ने याच्या याच प्रतिष्ठेमुळे त्याची शपथ वाहिली आहे.
२) 'मस्तुर' चा अर्थ आहे. मकतूब; लिहिलेली वस्तू. याचे वेगवेगळे अर्थ सांगण्यात आले आहे. कुरआन मजीद, लौहे महफुज, तमाम अवतीर्ण झालेली पुस्तके, किंवा ती मानवांची कर्म पत्रे ज्याला जी देवदूत लिहितात.
३) हे संबंधित आहे, लिखिताशी. 'रक्क' ते पातळ चामडे ज्यावर लिहीले जाते. मन्शुर, मबसूतच्या अर्थात पसरलेले किंवा खुले
४) हे 'बैते मामुर' सातव्या आकाशावर ते उपासनागृह आहे, ज्यांत देवदूत उपासना करतात. हे उपासना गृह देवदूताकडून अशाप्रकारे भरलेले असते कीं दररोज याच्यांत सत्तर हजार देवदूत, उपासने करिता येतात. ज्यांची मग दुसऱ्यांदा कयामतपर्यंत पाळी येत नाही. जसे कीं, मिअराजच्या हदीसमध्ये सांगण्यात आले आहे. काही 'बैते मामुर'ने अभिप्रेत खाना-ए-काबा घेतात. जो उपासनेसाठी येणाऱ्या लोकांनी नेहमी भरलेला असतो. 'मामुर' चा अर्थ 'आबाद आणि नेहमी भरलेले' असा आहे.
५) याच्याने अभिप्रेत आकाश आहे, जे पृथ्वीला छतासारखे आहे. कुरआनाने त्याला दुसऱ्या ठिकाणी 'सुरक्षित छत' म्हटले आहे, ''आकाशाला सुरक्षित छत पण आम्हीच बनविले आहे. परंतु लोक त्याच्या सामर्थ्याच्या नमुन्यावर लक्ष देत नाही.'' (सू.अंबिया-३२) काहींनी याच्याने (अल्लाह्चे) महासिंहासन अभिप्रेत धरले आहे, जे सर्व सृष्टी करता छत आहे.
६) मसजूर चा अर्थ आहे ऊतूं जाणारे (भडकलेले) काही म्हणतात, याच्याने ते पाणी अभिप्रेत आहे, जे महासिंहासनाखाली आहे. ज्यातून कयामतच्या दिवशी पाऊस पडेल. याच्याने मृत शरीरे जिवंत होऊन जातील. काही म्हणतात याच्याने अभिप्रेत समुद्र आहेत. यांच्यात कयामतच्या दिवशी आग भडकून उठेल. जसे फर्माविले, ''आणि जेव्हा समुद्र भडकवून दिले जातील'' (सू.तकवीर-६) इमाम शौकानींनी याच भावार्थाला प्राधान्य दिले आहे. आणि काहींनी मसजूर चा अर्थ ममलुअ (भरलेले) चा केला आहे.म्हणजे सध्यातर समुद्रात आग नाही; किंबहुना ते पाण्याने भरलेले आहेत. इमाम तबरी ने या म्हणण्याला अंगीकारले आहे. याचे आणखीही कित्येक अर्थ सांगण्यात आले आहेत.
७) हे शपथांचे उत्तर आहे. म्हणजे या तमाम गोष्टी, ज्या अल्लाह्तआलाच्या महान सामर्थ्याच्या द्योतक आहेत, या गोष्टीचे प्रमाण आहे, कीं, अल्लाह्ची ती शिक्षा पण खचित्च घडून येईल, जिचा त्याने वायदा केला आहे. तिला कोणी टाळण्यास समर्थ असणार नाही.
८) 'मौर' चा अर्थ आहे. अस्वस्थता आणि व्याकुळता. कयामतच्या दिवशी आकाशाच्या व्यवस्थेत जो व्यत्यय, आणि ग्रह आणि ताऱ्यांच्या तूट फूट मुळे जो व्यत्यय घडून येईल, त्यांना या शब्दात व्यक्त करण्यात आले आहे. आणि हे चर्चित शिक्षेकरीता निश्चित आहे. म्हणजे ही शिक्षा त्यादिवशी घडून येईल, जेव्हा आकाश थर थरू लागेल आणि पर्वत आपली जागा सोडून, कपाशीच्या बोळ्याप्रमाणे आणि वाळूच्या कणांप्रमाणे उडून जातील.

وَّ تَسِيْرُ الْجِبَالُ سَيْرًا ۝١٠

**आणि पर्वत चालू फिरू लागतील (१०)**

فَوَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ۝١١

**त्या दिवशी खोटे म्हणणाऱ्यांस फारच दु:ख आहे. (११)**

الَّذِيْنَ هُمْ فِيْ خَوْضٍ يَّلْعَبُوْنَ ۝١٢

**जे आपल्या बकवासांत खेळ कुद करीत[१] आहे. (१२)**

يَوْمَ يُدَعُّوْنَ اِلٰى نَارِ جَهَنَّمَ دَعًّا ۝١٣

**ज्या दिवशी त्यांना धक्के देऊन [२] देऊन, नर्काच्या अग्नीकडे घेऊन जाण्यांत येईल. (१३)**

هٰذِهِ النَّارُ الَّتِيْ كُنْتُمْ بِهَا تُكَذِّبُوْنَ ۝١٤

**हीच तर ही नर्काची आग आहे, जिला तुम्ही खोटे म्हणत होता. [३] (१४)**

اَفَسِحْرٌ هٰذَآ اَمْ اَنْتُمْ لَا تُبْصِرُوْنَ ۝١٥

**(आता सांगा!) काय ही जादू आहे?[४] का तुम्ही पाहतच नाही?[५] (१५)**

اِصْلَوْهَا فَاصْبِرُوْٓا اَوْ لَا تَصْبِرُوْا ۚ سَوَآءٌ عَلَيْكُمْ ۭ اِنَّمَا تُجْزَوْنَ مَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ۝١٦

**जा नरकाग्नीमध्ये आता तुमचे सहन करणे आणि न करणे, तुमच्यासाठी समान आहे. तुम्हांस फक्त तुमच्या केल्याचा बदला दिला जाईल. (१६)**

اِنَّ الْمُتَّقِيْنَ فِيْ جَنّٰتٍ وَّنَعِيْمٍ ۝١٧

**नि:संशय अल्लाहला भिणारे लोक स्वर्गांत आणि सुख चैनीत असतील. [६] (१७)**

فٰكِهِيْنَ بِمَآ اٰتٰىهُمْ رَبُّهُمْ ۚ وَوَقٰىهُمْ رَبُّهُمْ عَذَابَ الْجَحِيْمِ ۝١٨

**त्यांच्या पालनकर्त्याने जे त्यांना देऊन ठेवले आहे, त्यात ते आनंदात आहेत. [७] आणि त्यांच्या पालनकर्त्याने त्यांना नरकाग्नीच्या शिक्षेपासून वांचवून घेतले आहे. (१८)**

كُلُوْا وَاشْرَبُوْا هَنِيْٓــًٔا بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ۝١٩

**तुम्ही आनंदाने खात पित रहा, त्या कर्माच्या बदल्यात जी तुम्ही करीत होता. [८] (१९)**

مُتَّكِـِٕيْنَ عَلٰى سُرُرٍ مَّصْفُوْفَةٍ ۚ وَزَوَّجْنٰهُمْ بِحُوْرٍ عِيْنٍ ۝٢٠

**बरोबर बिछाईत केलेले, शानदार तख्तांवर, टेकून टेकून बसलेले; [९] आणि आम्ही त्यांचे लग्न, मोठ्या मोठ्या डोळ्यांच्या अप्सरांशी लावून दिले आहे. (२०)**

१) म्हणजे आपल्या कुफ्र आणि निरर्थक गोष्टींत व्यस्त, आणि सत्याला नाकारणे, आणि त्याचा उपहास करण्यात मग्न आहेत.

२) 'अद्दअू' चा अर्थ आहे फारच सक्तीने ढकलणे.

३) हे नरकाग्नीवर नेमलेले देवदूत, तोंडाने (जबानियह्) त्याना म्हणतील.

४) ज्या प्रमाणे तुम्ही जगात पैगंबरांना जादूगार म्हणत होता, सांगा! काय हे सुध्दा जादूचे कर्तब आहे?

५) किंवा ज्याप्रमाणे तुम्ही जगात, सत्याला पहाण्यापासून आंधळे होता ही शिक्षा पण तुम्हास दिसत नाही? हे उपहास आणि कान उघाडणीसाठी त्यांना सांगण्यांत येईल. नाही तर प्रत्येक गोष्ट त्यांच्या प्रत्यक्ष पाहण्यांत येऊन चुकली असेल.

६) कुफ्रवाले आणि दुर्दैवी लोकांनतर, ईमानवाले आणि भाग्यवंत लोकांची चर्चा केली जात आहे.

७) म्हणजे स्वर्गातील घरे, पोषाख, खाद्यान्ने, स्वाऱ्या, सुंदर सुंदर पत्न्या, (हुरेईन) आणि दुसऱ्या देणग्या, या सर्वांवर ते खूष असतील. कारण की या देणग्या जगांतील देणग्यांच्या मानाने हरप्रकारे वरचढ असतील. ''आणि ज्यांना कोण्या डोळ्यांनी पाहिले नाही, कोण्या कानांनी ऐकले नाही, आणि कोण्या माणसाच्या मनात त्यांचा विचार सुध्दा आला नाही,''ला पात्र असतील.

८) दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, (मजेत खा आणि प्या आपल्या त्या कर्मांच्या बदल्यात जे तुम्ही मागील काळात केले. सू. अलहाक्कः -२४) याच्याने ठाऊक झाले कीं, अल्लाहच्या दयेला पात्र ठरण्यासाठी, ईमानाबरोबर चांगली कामे करणे सुध्दा फार आवश्यक आहे.

९) 'मसफूफतीन' एक दुसऱ्या बरोबर मिळालेले. जणू ते एका रांगेत आहेत. किंवा काहींनी याचा भावार्थ सांगितला आहे. कीं, त्याचे चेहरे एक दुसऱ्याच्या समोर असतील. जशा युध्द क्षेत्रात फौजा एक दुसऱ्याच्या समोर असतात. या भावार्थाला कुरआनामध्ये दुसऱ्या जागी या शब्दात वर्णन केले आहे. ''एक दुसऱ्याच्या आमने सामने, तख्तांवर

وَالَّذِينَ آمَنُوا وَاتَّبَعَتْهُمْ ذُرِّيَّتُهُم بِإِيمَانٍ أَلْحَقْنَا بِهِمْ ذُرِّيَّتَهُمْ وَمَا أَلَتْنَاهُم مِّنْ عَمَلِهِم مِّن شَيْءٍ ۚ كُلُّ امْرِئٍ بِمَا كَسَبَ رَهِينٌ ﴿٢١﴾

**आणि ज्या लोकांनी ईमान आणले आणि त्यांच्या संततीने सुध्दा ईमानामध्यें त्यांचे अनुकरण केले, आम्ही त्यांच्या पोरा बाळांना त्यांचे पर्यंत पोहचवून देऊ आणि त्यांच्या कर्मातून आम्ही काहीही कमी करणार नाही.[१] प्रत्येक मनुष्य आपल्या कर्माच्या मोबदल्यात गहाण आहे.[२] (२१)**

وَأَمْدَدْنَاهُم بِفَاكِهَةٍ وَلَحْمٍ مِّمَّا يَشْتَهُونَ ﴿٢٢﴾

**आम्ही त्यांच्या करिता फळफळावळ आणि मनपसंत मांस, यांची रेलचेल करून टाकू[३] (२२)**

يَتَنَازَعُونَ فِيهَا كَأْسًا لَّا لَغْوٌ فِيهَا وَلَا تَأْثِيمٌ ﴿٢٣﴾

**(थट्टा मस्करीत) एक दुसऱ्यांच्या मद्याच्या प्याल्याची हिसकाहिसकी करतील.[४] ज्या मद्याच्या धुंदी मध्ये न तर बरळ राहील न पाप.[५] (२३)**

وَيَطُوفُ عَلَيْهِمْ غِلْمَانٌ لَّهُمْ كَأَنَّهُمْ لُؤْلُؤٌ مَّكْنُونٌ ﴿٢٤﴾

**आणि त्यांच्या आजुबाजूला लहान वयाची मुले चालत फिरत असतील; जणू की ते झाकून ठेवलेली मोत्येच होती.[६] (२४)**

१) म्हणजे ज्यांचे वडील, आपला निर्मळभाव, ईशभय आणि कर्म आणि कर्तृत्व, यांच्या आधारावर स्वर्गाच्या उच्च दर्जांत आरूढ होतील, अल्लाहतआला त्यांच्या ईमानदार संततीला सुध्दा, दर्जे उंचावून, त्यांना त्यांच्या बापाबरोबर मिळवून देईल. असे करणार नाहीं कीं, त्यांच्या वडीलांचे दर्जे कमी करून त्यांच्या संततीच्या कमी दर्जांत त्यांना घेऊन येईल. म्हणजे ईमानवाल्यांवर दुहेरी उपकार करील. एक तर पिता पुत्रांना आपसात भेटवून देईल. कीं, त्यांचे डोळे गार रहावेत. या अटीवर कीं, उभयता ईमानवाले असावे. दुसरा, हा की, कनिष्ठ दर्ज्यावाल्यांना उचलून, उच्च दर्जावर आरूढ करून देईल. नाहीतर दोघांच्या मिलापाची ही पध्दत पण असू शकते की, 'अ' वर्गवाल्यांना, 'ब' वर्ग देऊन द्यावा. ही गोष्ट कारण कीं, त्याच्या कृपा आणि उपकाराने ओतप्रोत असेल, म्हणून तो असे करणार नाही; किंबहुना ब वर्ग वाल्यांना, अ वर्ग बहाल करेल. हा तर अल्लाहचा तो उपकार आहे, जो संततीवर, वाडवडिलांच्या कर्मांच्या बरकतीने होईल. आणि हदीस मध्ये येते की, संततीच्या दुआ आणि क्षमायाचनेने, वाडवडिलांच्या दर्जात सुध्दा वाढ होत असते. एका मनुष्याचे जेव्हा स्वर्गांत दर्जे उच्च होतात तेव्हा तो अल्लाहला याचे कारण विचारतो. अल्लाहतआला फर्मावितो, तुझ्या संततीने तुझ्या करीता, क्षमायाचनेची दुआ केल्यामुळे. (मुसनद अहमद ५०९/२ ) याचे समर्थन त्या हदीसने सुध्दा होते, जिच्यांत येते कीं, ''जेव्हा मनुष्य मरून जातो, तेव्हा त्याच्या कर्मांची शृंखला खंडीत होऊन जाते. परंतु तीन वस्तुचे पुण्यफळ, मृत्यूनंतर सुध्दा चालू रहाते एक, सतत चालू राहणारा दानधर्म, दुसरे ते ज्ञान ज्याच्याने लोक लाभान्वयीत होत असतील, तिसरी, सदाचरणी संतती, जी त्याच्यासाठी दुआ करते.''(स. मुस्लिम)

२) रहीन, मरहून च्या अर्थात(गहाण ठेवलेली वस्तू) प्रत्येक मनुष्य आपल्या कर्माचा गहाण असेल. हे सर्व साधारण आहे. ईमानवाले आणि काफिर उभयतांना लागूआहे. आणि अर्थ आहे की जो जसे (चांगले किंवा वाईट) कर्म करेल त्याच्याप्रमाणे चांगला किंवा वाईट मोबदला मिळवील. किंवा याच्याने अभिप्रेत फक्त काफिर आहे की ते आपल्या कर्मांत गिरफ्तार होतील; जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''प्रत्येक मनुष्य आपल्या कर्मांत गिरफ्तार होईल,'' ईमानवाल्यांशिवाय.'' (सू.अलमुद्दस्सिर-३८-३९)

३) अम्‌दद्‌नाहुम, जिदनाहुम्च्या अर्थात म्हणजे खूप देतील.

४) यत्नाजऊन, एक दुसऱ्याजवळून घेतील. किंवा मग तो अर्थ आहे, जो विद्वान भाषांतरकाराने केला आहे. 'कास' त्या प्याल्यांना किंवा ग्लासांना म्हणतात, जो मद्य किंवा आणखी कोण्या पेयाने भरलेला असेल. खाली भांड्याला 'कास' म्हणत नाहीत. (फत्हुल कदीर)

५) या मद्यांत, जगातील मद्यांचा गुणधर्म असणार नाही. त्याला पिऊन न कोणी बहकेल, की निरर्थक बडबड करेल. न इतका धुंद आणि मस्त होईल कीं, पापाचरण करील.

६) म्हणजे स्वर्गवासींच्या सेवेकरिता त्यांना लहान मुले सेवक म्हणून दिले जातील. जे त्यांच्या सेवेकरिता फिरत असतील; आणि रूप सौंदर्यात आणि सफाईत आणि चापल्यांत ते असे असतील जसे मोती; ज्याला झांकून ठेवले असेल; कारण की हात लागल्यामुळे त्यांची चमक फिकी न पडून जावी.

وَاَقْبَلَ بَعْضُهُمْ عَلٰى بَعْضٍ يَّتَسَآءَلُوْنَ ﴿٢٥﴾
**आणि आपसात एकदुसऱ्याकडे वळून गप्पा गोष्टी करतील.[१] २५**

قَالُوْٓا اِنَّا كُنَّا قَبْلُ فِيْٓ اَهْلِنَا مُشْفِقِيْنَ ﴿٢٦﴾
**म्हणतील कीं याच्यापूर्वी आम्ही आपल्या घरात फारच भीत असू[२] २६**

فَمَنَّ اللّٰهُ عَلَيْنَا وَوَقٰىنَا عَذَابَ السَّمُوْمِ ﴿٢٧﴾
**तर अल्लाहने आम्हावर फारच मोठा उपकार केला आणि आम्हाला फारच तीव्र भयंकर अशा उष्ण वाऱ्यांच्या झळींच्या शिक्षेपासून वांचवून घेतले[३] २७**

اِنَّا كُنَّا مِنْ قَبْلُ نَدْعُوْهُ ۭ اِنَّهٗ هُوَ الْبَرُّ الرَّحِيْمُ ﴿٢٨﴾
**आम्ही याच्यापूर्वीच याची उपासना करीत [४] होतो. नि:संशय तो परोपकारी आणि दयाळूंआहे. २८**

فَذَكِّرْ فَمَآ اَنْتَ بِنِعْمَتِ رَبِّكَ بِكَاهِنٍ وَّلَا مَجْنُوْنٍ ﴿٢٩﴾
**तर आपण समजावीत रहा, कारण की, आपण आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने न भविष्य सांगणारे आहात न वेडे.[५] २९**

اَمْ يَقُوْلُوْنَ شَاعِرٌ نَّتَرَبَّصُ بِهٖ رَيْبَ الْمَنُوْنِ ﴿٣٠﴾
**काय काफिर असे म्हणतात की, हा कवी आहे, आम्ही त्याच्या संबंधात कालचक्राची (म्हणजे मृत्युची) वाट पहात आहोत.[६] ३०**

قُلْ تَرَبَّصُوْا فَاِنِّيْ مَعَكُمْ مِّنَ الْمُتَرَبِّصِيْنَ ﴿٣١﴾
**आपण सांगून द्या! तुम्ही वाट पहा! मी सुध्दा तुमच्या बरोबर वाट पहाणाऱ्यांमधून आहे.[७] ३१**

اَمْ تَاْمُرُهُمْ اَحْلَامُهُمْ بِهٰذَآ اَمْ هُمْ قَوْمٌ طَاغُوْنَ ﴿٣٢﴾
**काय त्यांची बुध्दी त्यांना हेच शिकविते? [८] किंवा हे लोक खोडसळपणावरच आहेत?[९] ३२**

اَمْ يَقُوْلُوْنَ تَقَوَّلَهٗ ۚ بَلْ لَّا يُؤْمِنُوْنَ ﴿٣٣﴾
**काय हे म्हणतात कीं, या पैगंबराने (कुरआन) स्वत:चे रचले आहे? खरी गोष्ट अशी आहे कीं, त्यांच्यात ईमान (च) नाही.[१०] ३३**

१) एक दुसऱ्याशी जगातील अहवाल विचारतील कीं जगात ते कोणत्या परिस्थितीत जीवन घालवित होते आणि ईमान आणि कर्माचे तगादे कशा प्रकारे पूर्ण करीत होते?

२) म्हणजे अल्लाहच्या शिक्षेने. म्हणून या शिक्षेपासून वांचण्याची काळजी पण घेत राहिले. यासाठी कीं माणसाला ज्या गोष्टीचे भय वाटते, त्यापासून वांचण्याची तो पराकाष्टा पण करतो.

३) 'समूम,' झळ, होरपळून टाकणाऱ्या उष्ण वाऱ्याला म्हणतात. तसेच नरकाग्नीच्या नावामधून एक नाव पण आहे.

४) म्हणजे फक्त याच एकाची उपासना करीत होते. त्याच्या बरोबर कोणाला सरकतदार ठरवत नव्हते. किंवा हा अर्थ आहे कीं, त्याच्याचजवळ नरकाग्नीच्या शिक्षेपासून वाचण्याची प्रार्थना पण करीत होते.

५) याच्यांत नबी ﷺ ची सात्वना केली जात आहे कीं, आपण प्रवचन, आवाहन आणि उपदेशाचे काम करीत रहा. आणि हे आपल्या बाबतीत जे काही म्हणत आहेत. त्याच्याकडे दुर्लक्ष करावे. यासाठी कीं आपण अल्लाहच्या कृपेने भविष्य सांगणारे आहेत, न वेडे (जसे कीं, हे म्हणतात) परंतु आपल्यावर नियमितपणे आमच्याकडून वह्य येत असते, जे की भविष्य वेत्त्यावर येत नसते. आपण जी वाणी लोकांना ऐकवितात, ती बुध्दीयुक्त आणि अंतरदृष्टीचा आरसा असते. एका वेड्याकडून अशा प्रकारचे संभाषण, कसे काय शक्य आहे?

६) 'रैब' चा अर्थ आहे, आपत्ती 'मनून' मृत्युच्या नावामधून एक नाव आहे. अर्थ आहे कीं, मक्केचे कुरैश, याची वाट पहतात कीं, काळाच्या आपत्तीने कदाचित् या (मुहम्मद ﷺ) ला मरण येऊन जावे. आणि आमचे समाधान होऊन जावे. जे याच्या एकेश्वरवादाच्या आवाहनाने, आमच्यापासून हिसकावून घेतले आहे.

७) म्हणजे पहा! मरण कोणाला प्रथम येते? आणि गारद होणे कोणाच्या नशीबी आहे?

८) म्हणजे हे तुझ्या बाबतीत जे अशा प्रकारे अनाप सनाप बोलतात, खोटे आणि चुकीच्या गोष्टी बोलत राहतात. काय त्यांची बुध्दी त्यांना हेच सुचवते?

९) नाही! किंबहुना हे शिरजोर आणि बहकलेले लोक आहेत. आणि हीच शिरजोरी आणि बहकणे, त्यांना या गोष्टींवर उकसवत रहाते.

१०) म्हणजे कुरआन रचण्याच्या आरोपावर, त्यांना तयार करणारे पण, त्यांचे कुफ्रच आहे.

فَلۡيَاۡتُوۡا بِحَدِيۡثٍ مِّثۡلِهٖۤ اِنۡ كَانُوۡا صٰدِقِيۡنَ ۝٣٤

**बरे! हे जर खरे आहेत, तर मग यासारखी एक गोष्ट यांनी पण तर आणून दाखववावी.** [१] ३४

اَمۡ خُلِقُوۡا مِنۡ غَيۡرِ شَىۡءٍ اَمۡ هُمُ الۡخٰلِقُوۡنَ ۝٣٥

**काय हे कोण्या (निर्माण करणाऱ्या) शिवाय स्वत:च निर्माण होऊन गेले आहेत?** [२] **किंवा हे स्वत: निर्माण करणारे आहेत?** [३] ३५

اَمۡ خَلَقُوا السَّمٰوٰتِ وَ الۡاَرۡضَ‌ ۚ بَلْ لَّا يُوۡقِنُوۡنَ ۝٣٦

**काय त्यांनीच आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले आहे? किंबहुना हे विश्वास न ठेवणारे लोक आहेत.** [४] ३६

اَمۡ عِنۡدَهُمۡ خَزَآئِنُ رَبِّكَ اَمۡ هُمُ الۡمُصَۜيۡطِرُوۡنَ ۝٣٧

**किंवा काय यांच्याजवळ तुझ्या पालनकर्त्याचे खजीने आहेत?** [५] **किंवा (या खजीन्याचे) ते रखवालदार आहेत?** [६] ३७

اَمۡ لَهُمۡ سُلَّمٌ يَّسۡتَمِعُوۡنَ فِيۡهِ‌ ۚ فَلۡيَاۡتِ مُسۡتَمِعُهُمۡ بِسُلۡطٰنٍ مُّبِيۡنٍ ۝٣٨

**किंवा काय यांच्याजवळ कोणी शिडी आहे, जिवर चढून हे ऐकून आले आहेत?** [७] **(जर असे आहे) तर यांच्या ऐकणाऱ्याने त्याचे स्पष्ट प्रमाण पुढे करावे.** ३८

اَمۡ لَهُ الۡبَنٰتُ وَلَـكُمُ الۡبَنُوۡنَ ۝٣٩

**काय अल्लाहच्या तर सर्व मुली आहेत आणि तुमच्याजवळ मुले आहेत?** ३९

اَمۡ تَسۡـَٔـلُهُمۡ اَجۡرًا فَهُمۡ مِّنۡ مَّغۡرَمٍ مُّثۡقَلُوۡنَ ۝٤٠

**काय तू यांच्याकडून काही वेतन मागतोस की हे त्याच्या ओझ्याने भारावून गेले आहेत.** [८] ४०

اَمۡ عِنۡدَهُمُ الۡغَيۡبُ فَهُمۡ يَكۡتُبُوۡنَ ۝٤١

**काय यांच्याजवळ अदृष्टाचे ज्ञान आहे, ज्याला हे लिहून घेतात?** [९] ४१

اَمۡ يُرِيۡدُوۡنَ كَيۡدًا‌ ؕ فَالَّذِيۡنَ كَفَرُوۡا هُمُ الۡمَكِيۡدُوۡنَ ۝٤٢

**काय हे लोक कोणी धोका देऊं इच्छितात?** [१०] **तर (लक्षात ठेवा की) धोका खाणारा समूह काफिरांचाच आहे.** [११] ४२

१) म्हणजे जर हे आपल्या दाव्यात खरे आहेत, की हे कुरआन मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम चे स्वत: रचलेले आहे, तर यांनी पण याच्या सारखे पुस्तक तयार करून सादर करावे. जे काव्य, शान आणि विद्वत्ता, वर्णन शैली नाविन्यपूर्ण चाल वास्तवाला निश्चित करणारे, समस्यांचे निराकरण करणारे, यांच्यात सामना करणारे असावे.

२) म्हणजे जर खरोखर असे आहे, तर मग कोणाला हा हक्क नाही कीं, त्यांनी कोण्या गोष्टीचा हुकूम करावा. किंवा कोण्या गोष्टी पासून मना करावे परंतु जेव्हा असे नाही, किंबहुना त्यांना एका निर्माण करणाऱ्याने निर्माण केले, तर उघड आहे, त्याचा त्यांना निर्माण करण्याचा एक खास उद्देश्य आहे; तो त्यांना निर्माण करून असेच कसे सोडून देईल?

३) म्हणजे हे स्वत: पण आपले निर्माते नाहीत किंबहुना हे अल्लाहला निर्माणकर्ता होण्याला मान्य करतात.

४) किंबहुना, अल्लाहचे वायदे आणि धमक्यांच्या बाबतीत शंकेत पडले आहेत.

५) कीं हे ज्याला इच्छतील अन्नसंपत्ती देतील आणि ज्याला इच्छतील देणार नाही. किंवा ज्याला इच्छतील त्याला पैगंबरी बहाल करतील.

६) 'मुसय्तिर' 'सतर' पासून आहे. लिहिणारा जो संरक्षण कर्ता आणि लक्ष देणारा असावा. तो कारण कीं सारा तपशील लिहितो, म्हणून हा संरक्षक आणि लक्ष देणाऱ्याच्या अर्थांत उपयोगात आणला जातो. म्हणजे अल्लाहचे खजीने किंवा त्याच्या दयेवर यांचा अधिकार आहे, कीं ज्याला इच्छतील देतील किंवा देणार नाही.

७) म्हणजे काय यांचा दावा आहे कीं, शिडीच्या मार्फत हे सुध्दां, मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम प्रमाणे आकाशावर जाऊन, देवदुतांच्या गोष्टी, किंवा त्यांच्याकडे जे वह्य केले जाते, ते ऐकून आले आहेत.

८) म्हणजे याला अदा करणे त्यांच्याकरीता कठीण असावे.

९) कीं, अवश्य यांच्यापूर्वी, मुहम्मद ﷺ मरून जातील आणि त्यांना मृत्यु यांच्यानंतर येईल.

१०) म्हणजे आमच्या पैगंबरांबरोबर ज्याने तो गारद होऊन जाईल.

११) म्हणजे त्यांचे डाव पेच त्यांच्यावरच उलटून पडतील. आणि सर्व नुकसान त्यांचेच होईल. जसे फर्माविले, ''आणि वाईट डावपेचाचा अनिष्ट परिणाम त्या डावपेच करणाऱ्यावरच पडतो.'' (सू.फातिर-४३) म्हणून बद्र मध्ये हे काफिर मारले गेले. आणखी सुध्दांअनेक ठिकाणी फट्फजिती आणि अपमानांत व्यस्त झालेत.

أَمْ لَهُمْ إِلَٰهٌ غَيْرُ اللَّهِ ۚ سُبْحَانَ اللَّهِ عَمَّا يُشْرِكُونَ ﴿٤٣﴾
**काय अल्लाहच्या शिवाय यांचा अन्य कोणी उपास्य आहे? (मुळीच नाही) अल्लाहतआला त्यांच्या शिर्क पासून पवित्र आहे. ४३**

وَإِن يَرَوْا كِسْفًا مِّنَ السَّمَاءِ سَاقِطًا يَقُولُوا سَحَابٌ مَّرْكُومٌ ﴿٤٤﴾
**जर हे लोक आकाशाच्या कोण्या तुकड्याला पडतांना पाहून घेतील, तरी सुध्दा म्हणू लागतील कीं हा थरावर थर असलेला ढग आहे.[१] ४४**

فَذَرْهُمْ حَتَّىٰ يُلَاقُوا يَوْمَهُمُ الَّذِي فِيهِ يُصْعَقُونَ ﴿٤٥﴾
**तू यांना याच स्थितीवर राहूं दे! येथपर्यंत की त्यांना त्या दिवसाला सामोरे जावे लागेल, ज्यांत हे बेशुध्द करून दिले जातील, ४५**

يَوْمَ لَا يُغْنِي عَنْهُمْ كَيْدُهُمْ شَيْئًا وَلَا هُمْ يُنصَرُونَ ﴿٤٦﴾
**ज्या दिवशी त्याचे डावपेच काही कामा येणार नाही आणि न त्यांची कोणी मदत केली जाईल. ४६**

وَإِنَّ لِلَّذِينَ ظَلَمُوا عَذَابًا دُونَ ذَٰلِكَ وَلَٰكِنَّ أَكْثَرَهُمْ لَا يَعْلَمُونَ ﴿٤٧﴾
**नि:संशय जालीम लोकांकरिता याच्या शिवाय आणखी शिक्षा[२] पण आहे. परंतु, या लोकांमधून बहुतेकांना ठाऊक[३] नाही. ४७**

وَاصْبِرْ لِحُكْمِ رَبِّكَ فَإِنَّكَ بِأَعْيُنِنَا ۖ وَسَبِّحْ بِحَمْدِ رَبِّكَ حِينَ تَقُومُ ﴿٤٨﴾
**आणि तू आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेच्या प्रतीक्षेत संयमाने काम घे, नि:संशय तू आमच्या डोळ्यांसमोर आहे (सकाळी) जेव्हा तू (निजून) उठशील,[४] आपल्या पालनकर्त्याचे पावित्र्य आणि स्तुती वर्णन कर. ४८**

وَمِنَ اللَّيْلِ فَسَبِّحْهُ وَإِدْبَارَ النُّجُومِ ﴿٤٩﴾
**आणि रात्री सुध्दा त्याची पवित्रता वर्णित रहा.[५] आणि नक्षत्रांच्या मावळते वेळी सुध्दा[६] ४९**

१) अर्थ आहे की, आपल्या कुफ्र आणि अहंकाराने तरी सुध्दा माघार घेणार नाहीत, किंबहुना उध्दटपणा जाहीर करीत म्हणतील की, ही शिक्षा नाही किंबहुना एकावर एक चढलेला ढग चालून येत आहे, जसे की काही वेळा असे होते.

२) म्हणजे जगात जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''खचित्च आम्ही त्यांना जवळच्या छोट्याशा काही शिक्षा या मोठ्या शिक्षेशिवाय, चाखवू की त्यांनी आमच्याकडे वळावे.'' (सू.अलीफ-लाम-मीम् सज्दा-२१)

३) या गोष्टीने कीं, जगातील या शिक्षा आणि आपत्ती या साठी आहेत की, मनुष्याने अल्लाहकडे वळावे. हा मुद्दा कारण कीं, समजत नाहीं, म्हणून गुन्हयांपासून तौबा करीत नाहीं. किंबहुना काही वेळा पहिल्या पेक्षा सुध्दा जास्त, गुन्हे करू लागतात. ज्याप्रमाणे एका हदीसमध्ये फर्माविले, कीं, दांभिक (मुनाफिक) आजारी पडून, बरा होऊन जातो. तर त्याचे उदाहरण उंटासारखे आहे. तो जाणत नाही कीं, त्याला का दोरांनी बांधले गेले आहे. आणि का मोकळे सोडून दिले गेले.'' (सुनन अबुदाऊद)

४) या उभे रहाण्याने कोणते उभे रहाणे अभिप्रेत आहे? काही म्हणतात कीं, जेव्हा नमाजीसाठी उभे रहातात. जसे की नमाजीच्या सुरवातीला सुबहान काअल्लाहुम्मा व बिहम्दिक व तबार कस्मुक...... म्हटले जाते. काही म्हणतात कीं जेव्हा झोपेतून जागे होऊन, उभे रहावे. यावेळी सुध्दा अल्लाहचे पावित्र्य वर्णन आणि स्तुती करणे सुन्नत आहे. काही म्हणतात कीं, जेव्हा कोण्या बैठकीनंतर उठून उभे रहातात. जसे हदीस मध्ये येते, जो मनुष्य कोण्या बैठकी नंतर उठते वेळी ही दुआ म्हणेल, तर ही त्याच्या बैठकीतील गुन्हयांचे प्रायश्चित्त होऊन जाईल. ''सुबहान काअल्लाहुम्मा व बिहम्दिका अशहदो अल्लाहला ईलाहा इल्ला अन्त अस्तगफिरूक व अतुबुइलैक.'' (तिर्मिझी)

५) याच्याने अभिप्रेत कयामुल्लैल म्हणजे तहज्जुदची नमाज आहे, जी आयुष्यभर नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची नित्याची पध्दत राहिली.

६) याच्याने अभिप्रेत फज्रच्या दोन सुन्नत नमाज आहे. नफीली नमाज़मध्ये सर्वांत जास्त इचे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम पालन करीत असत. आणि एका रिवायतीमध्ये आपण ﷺ नी फर्माविले, 'सकाळच्या दोन सुन्नती सारेजग आणि जे काही त्यात आहे, त्यापेक्षा उत्तम आहे. (स.बुखारी व मुस्लिम)

महावाक्ये ६२ | (५३) सू. नजम | रुकूअ ३

آياتها ٦٢ (٥٣) سُوْرَةُ النَّجْمِ مَكِّيَّةٌ (٢٣) رُكُوعَاتُهَا ٣

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَالنَّجْمِ إِذَا هَوٰى ۙ ﴿١﴾

शपथ आहे ताऱ्याची जेव्हा तो तुटून पडतो.[१] (१)

مَا ضَلَّ صَاحِبُكُمْ وَمَا غَوٰى ۚ ﴿٢﴾

की, तुमच्या सोबत याने न (सरळ) मार्ग सोडला आहे आणि न तो वक्र मार्गावर आहे.[२] (२)

وَمَا يَنْطِقُ عَنِ الْهَوٰى ۗ ﴿٣﴾

न आपल्या मनेच्छेने कोणी गोष्ट बोलतात. (३)

إِنْ هُوَ إِلَّا وَحْيٌ يُّوْحٰى ۙ ﴿٤﴾

ते तर फक्त वह्य आहे जे उतारले जाते.[३] (४)

عَلَّمَهٗ شَدِيْدُ الْقُوٰى ۙ ﴿٥﴾

त्याला फारच बलवान देवदूताने शिकविले आहे. (५)

ذُوْ مِرَّةٍ ۭ فَاسْتَوٰى ۙ ﴿٦﴾

जो शक्तीमान आहे,[४] मग तो सरळ उभा राहून गेला (६)

وَهُوَ بِالْأُفُقِ الْأَعْلٰى ۭ ﴿٧﴾

आणि तो उंच आकाशाच्या किनाऱ्यावर होता.[५] (७)

ثُمَّ دَنَا فَتَدَلّٰى ۙ ﴿٨﴾

मग जवळ झाला आणि उतरून आला[६] (८)

हा पहिला अध्याय आहे, ज्याला रसूलुल्लाह् ﷺ नी काफिरांच्या सर्व साधारण समुदायापुढे वांचले. वाचनानंतर आपण ﷺ आणि आपल्यमागे जितके लोक होते, सर्वांनी सज्दा केला, उमय्या बिन खल्फच्या शिवाय. त्याने आपल्या मुठीत माती घेऊन त्यावर सज्दा केला,म्हणून हा कुफ्रच्या अवस्थेतच मारला गेला. (स.बुखारी, तफसीर सु. नज्म) काही ठिकाणी या माणसाचे नाव उतबा बिन रबीया सांगण्यांत आले आहे. (तफसीर इब्ने कसीर) वल्लाह् अअ्लम ! ह. जैद बिन साबित رضي الله عنه म्हणतात मी या अध्यायाचे वाचन आपणा ﷺ समोर केले, आपण याच्यात सजदह केला नाही. (स. बुखारी) याचा अर्थ हा झाला कीं, सजदा करणे मुस्तहब आहे फर्ज नाहीं, जर कधी सोडून पण दिला तरी हरकत नाही.

१) काही भाष्यकारांनी ताऱ्याने अभिप्रेत शुक्राचा तारा आणि काहींनी (जुहरा) तारा अभिप्रेत घेतला आहे. आणि काहींनी तारे 'हवा', वरून खाली पडणे. म्हणजे जेव्हा रात्रीच्या संपतांना सकाळच्या वेळी तो पडतो. किंवा शैतानांना मारण्यासाठी पडतो, किंवा काहींच्या म्हणण्याप्रमाणे कयामतच्या दिवशी पडतील.

२) हे शपथेचे उत्तर आहे. साहिबुकुम् (तुमचा सोबती) म्हणून नबी ﷺ च्या सत्यतेला अगदी स्पष्ट करून देण्यात आले आहे, की पैगंबरीच्या पूर्वी चाळीस वर्षे याने तुमच्याबरोबर आणि तुमच्या दर्म्यान घालविले आहेत. याचे रात्रदिवसाचे सर्व व्यवहार तुमच्या समोर आहेत. त्याचे चारित्र्य आणि कर्तृत्व, तुमच्या ओळखीचे आहे. सत्य बोलणे आणि विश्वसनीयतेच्या शिवाय तुम्ही याच्या कर्तृत्वात काही आणखी पण पाहिले? आता चाळीस वर्षानंतर जो, तो पैगंबरीचा दावा करीत आहे, तर जरा विचार करा! तो कशा प्रकारे खोटा होऊं शकतो? म्हणून खरी गोष्ट अशी आहे की, न तो मार्गभ्रष्ट आहे, न बहकलेला आहे. 'जलालत,' सत्त्याच्या मार्गाकडून ते तोंड फिरविणे आहे, जे अज्ञानाने आणि ठाऊक नसण्याने होते. आणि 'गवायत', ती वक्रता आहे, जी जाणून बुजून, सत्याला सोडून, अंगीकारली जावी. अल्लाहत्आलाने दोहो प्रकारच्या बहकण्यापासून, आपल्या पैगंबराचे स्वच्छ असल्याचे जाहीर केले.

३) म्हणजे तो मार्गभ्रष्ट किंवा बहकलेला कसा असू शकतो? तो अल्लाहच्या वह्या शिवाय तोंडच उघडत नाही. येथपर्यंत की, थट्टा मस्करीच्या वेळी सुध्दा आपल्या शुभमुखाने सत्याशिवाय काहीही निघत नसे. (तिर्मिझी) अशाच प्रकारे रागाचे वेळी आपणास ﷺ आपल्या भावनांवर एवढा कंट्रोल असे की आपल्या ﷺ मुखाने कुठली ही गोष्ट घटनेच्या विरूध्द निघत नसे. (अबुदाऊद)

४) याच्याने अभिप्रेत जिब्रईल عليه السلام देवदूत आहेत. जो शक्तीमान बाहुंचा मालक, आणि फारच बलवान आहे. पैगंबरांवर वह्य आणणारा आणि शिकविणारा हाच देवदूत आहे.

५) म्हणजे जिब्रईल عليه السلام वह्य शिकविल्यानंतर, आकाशाच्या किनाऱ्यावर जाऊन उभे राहिले.

६) मग जमिनीवर उतरले, आणि हळूंहळू नबी सल्लल्लाहु अलैहि सल्लमच्या जवळ आले.

| | |
|---|---|
| **बस दोन कमानीं एवढे अंतर राहून गेले किंबहुना याच्यापेक्षांसुध्दा कमी**[१] ⑨ | فَكَانَ قَابَ قَوْسَيْنِ أَوْ أَدْنَىٰ ٩ |
| **मग त्याने अल्लाहच्या सेवकाला संदेश पोहचविला** [२] **जो पण पोहचविला** ⑩ | فَأَوْحَىٰ إِلَىٰ عَبْدِهِ مَا أَوْحَىٰ ١٠ |
| **मनाने खोटे नाही सांगितले, ज्याला पाहिले**[३] ⑪ | مَا كَذَبَ الْفُؤَادُ مَا رَأَىٰ ١١ |
| **काय तुम्ही भांडतात, यावर जे (पैगंबर) पहातात.** ⑫ | أَفَتُمَارُونَهُ عَلَىٰ مَا يَرَىٰ ١٢ |
| **त्याला तर एक वेळा आणखी पण पाहिले होते.** ⑬ | وَلَقَدْ رَآهُ نَزْلَةً أُخْرَىٰ ١٣ |
| **'सिद्रातुल मुन्तहा' जवळ**[४] ⑭ | عِندَ سِدْرَةِ الْمُنتَهَىٰ ١٤ |
| **याच्याचजवळ 'जन्नतुल मावा' आहेत.** [५] ⑮ | عِندَهَا جَنَّةُ الْمَأْوَىٰ ١٥ |
| **जेव्हा की 'सिद्रा' ला लपवून घेत होती, ती वस्तू जी लपवून घेत होती.** [६] ⑯ | إِذْ يَغْشَى السِّدْرَةَ مَا يَغْشَىٰ ١٦ |
| **न नजर चळली, न मर्यादेबाहेर गेली.** [७] ⑰ | مَا زَاغَ الْبَصَرُ وَمَا طَغَىٰ ١٧ |
| **खचित्‌च त्याने आपल्या पालनकर्त्याच्या मोठ्या मोठ्या निशाण्यामधून काही निशाण्या पाहून घेतल्या.** [८] ⑱ | لَقَدْ رَأَىٰ مِنْ آيَاتِ رَبِّهِ الْكُبْرَىٰ ١٨ |

१) काहींनी भाषांतर केले आहे, 'दोन हाता एवढे' हे नबी ﷺ आणि जिब्रईल عليه السلام च्या आपसातील सानिध्याचे वर्णन आहे. अल्लाहतआला आणि नबी ﷺ च्या सानिध्याचे नाही. जसे की काहीं लोक सांगतात. महावाक्यांच्या संदर्भानुसार स्वच्छ, स्पष्ट आहे कीं, यांच्यात फक्त जिब्रईल आणि पैगंबराचे वर्णन आहे. याच सानिध्याच्या वेळीं, नबी ﷺ नी, जिब्रईल عليه السلام ला त्यांच्या मूळ रूपांत पाहिले. आणि ही पैगंबरीच्या सुरवातीच्या काळातील घटना आहे. ज्याचा उल्लेख या महावाक्यांत करण्यात आला आहे. दुसऱ्या वेळेस, मूळ रूपांत, मिअराजच्या रात्री पाहिले.

२) म्हणजे जिब्रईल عليه السلام, अल्लाहचे सेवक हजरत मुहम्मद ﷺ च्या करिता जे वह्य किंवा संदेश घेऊन आले होते, तो त्यांनी आपल्या ﷺ जवळ पोहचविला.

३) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी जिब्रईल عليه السلام ला मूळ रूपांत पाहिले कीं त्यांचे सहाशे पंख आहेत. एक पंख पूर्व आणि पश्चिमेच्या अंतरा एवढा होता. याला आपण ﷺ च्या मनाने खोटे ठरविले नाही; किंबहुना अल्लाहच्या या महान सामर्थ्याला मान्य केले.

४) हे मिअराजच्या रात्री, जेव्हा मूळ रूपात जिब्रईल عليه السلام ला पाहिले, त्याचे वर्णन आहे. हे 'सिद्रतुल् मुन्तहा', एक बोराचे झाड आहे, जे सहाव्या किंवा सातव्या आकाशावर आहे. आणि ही शेवटची सिमा आहे; याच्यावर कोणी देवदूत जाऊं शकत नाहीं. देवदूत अल्लाहचे आदेशपण येथूनच प्राप्त करतात.

५) याला 'जन्नतुल मावा' यासाठी म्हणतात कीं, ह. आदम عليه السلام चे ठिकाण आणि रहाण्याचे स्थान हेच होते. काही म्हणतात कीं, आत्मे येथे येऊन गोळा होतात. (फत्हुल कदीर)

६) हे सिद्रतुल मुन्तहाच्या त्या अवस्थेचे वर्णन आहे, जेव्हा मिअराजच्या रात्री आपण ﷺ नी याला प्रत्यक्ष पाहिले. सोन्याचे पतंगे याच्या अवती भवती उडत होते. देवदुतांची छबी त्यांच्यावर पडत होती. आणि अल्लाहचा प्रकाश तेज पण तेथेच दिसत होते. (इब्ने कसीर वगैरे) या ठिकाणी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला तीन गोष्टी बहाल करण्यात आल्यात पाच वेळच्या नमाजी, सु. बकरःची शेवटची महावाक्ये, आणि त्या मुसलमानाच्या क्षमेचा वायदा, जो शिर्कच्या घाणीपासून पवित्र असेल. (स.मुस्लिम)

७) म्हणजे नबी ﷺ च्या नजरा उजवीकडे डावीकडे फिरल्या आणि न त्या सिमेहून उंच आणि आपल्या सिमेला ओलांडणाऱ्या झाल्यात, जी आपल्यासाठी निश्चित करून देण्यात आली होती. (अयसरुत तफासीर)

८) ज्यात जिब्रईल आणि सिद्रतुल मुन्तहा ला पाहणे आणि अल्लाहच्या दुसऱ्या सामर्थ्याच्या निशाण्यांना प्रत्यक्ष पहाणे आहे, ज्याचा काही तपशील मिअराजच्या हदीसीमध्ये सांगण्यात आला आहे.

أَفَرَءَيْتُمُ اللّٰتَ وَالْعُزّٰى ﴿١٩﴾
**काय तुम्ही लात आणि उज्जाला पाहिले? (१९)**

وَمَنٰوةَ الثَّالِثَةَ الْأُخْرٰى ﴿٢٠﴾
**आणि मागील तिसऱ्या (बुत) मनात ला. [१] (२०)**

أَلَكُمُ الذَّكَرُ وَلَهُ الْأُنْثٰى ﴿٢١﴾
**काय तुमच्या करता मुलगे आणि अल्लाहकरीता मुली [२] आहेत? (२१)**

تِلْكَ إِذًا قِسْمَةٌ ضِيْزٰى ﴿٢٢﴾
**ही तर आता मोठ्या अन्यायाची वाटणी आहे. [३] (२२)**

إِنْ هِيَ إِلَّا أَسْمَاءٌ سَمَّيْتُمُوهَا أَنْتُمْ وَآبَاؤُكُمْ مَا أَنْزَلَ اللّٰهُ بِهَا مِنْ سُلْطٰنٍ ۚ إِنْ يَتَّبِعُونَ إِلَّا الظَّنَّ وَمَا تَهْوَى الْأَنْفُسُ ۖ وَلَقَدْ جَاءَهُمْ مِنْ رَبِّهِمُ الْهُدٰى ﴿٢٣﴾
**खरे म्हणजे ही फक्त नावे आहेत, जी तुम्ही आणि तुमच्या वाडवडीलांनी ठेऊन घेतली आहेत. अल्लाहने त्यांचे काही प्रमाण उतारले नाही. हे लोक तर फक्त अटकळीवर आणि आपल्या मनेच्छेच्या मागे पडलेले आहेत. आणि खचित्‌च त्यांच्या पालनकर्त्याकडून त्यांच्याजवळ सन्मार्ग (हिदायत) येऊन चुकला आहे. (२३)**

أَمْ لِلْإِنْسَانِ مَا تَمَنّٰى ﴿٢٤﴾
**काय प्रत्येक मनुष्य जी आकांक्षा करेल त्याला प्राप्त होणार आहे? [४] (२४)**

فَلِلّٰهِ الْآخِرَةُ وَالْأُولٰى ﴿٢٥﴾
**अल्लाहच्याच अखत्यारांत आहे इहलोक आणि परलोक [५] (२५)**

१)हे मुशरिकांच्या कान उघाडणीकरीता सांगण्यात येत आहे कीं, अल्लाहची तर ही शान आहे जी चर्चित झाली कीं, जिब्रईल सारख्या महान देवदुताचा तो निर्माता आहे. मुहम्मद रसूलुल्लाह ﷺ सारखे त्याचे पैगंबर आहेत. ज्यांना त्याने आकाशावर बोलावून, मोठ्या मोठ्या निशाण्यांना प्रत्यक्ष दाखवून पण दिले. आणि वह्य पण त्यांच्यावर अवतरीत करतो. काय तुम्ही ज्या उपास्यांची उपासना करतात, त्यांच्यात सुध्दा या किंवा अशा प्रकारच्या खुब्या आहेत? या संदर्भात अरबांच्या तीन प्रसिद्ध मूर्त्यांची नावे उदाहरण म्हणून घेतली. काहींच्या जवळ 'लात' यलैत पासून आहे. त्याचा अर्थ वळण्याचा आहे. पुजारी आपल्या माना त्याच्याकडे वळवीत आणि त्याला प्रदक्षिणा घालीत म्हणून हे नाव पडले. काही म्हणतात कीं, लात हा एक सदाचरणी मनुष्य होता. हाजी लोकांना सत्तु घोळून घोळून पाजित होता. जेव्हा तो मरून गेला, तेव्हा लोकांनी त्याच्या कबरीला उपासना गृह बनवून घेतले. मग याचे पुतळे आणि मूर्त्या बनून गेल्यात. ही ताईफ मध्ये बनुसकीफची सर्वांत मोठी मूर्ती होती. 'उज्जा' म्हणतात कीं, हे गितफान मध्यें एक वृक्ष होता, ज्याची उपासना केली जात होती. काही म्हणतात की,शैतान (स्त्रीलिंगी) होती. जी काही झाडावर दिसत असे. काही म्हणतात की, हा शुभ्र दगड होता ज्याची पुजा केली जात होती. हा कुरैश आणि बनु कनानाचा खास उपास्य होता. 'मनात' चा अर्थ सब्ब (वहाविण्याचा) आहे. याचे सानिध्य प्राप्त करण्यासाठी लोक याच्याजवळ भरपूर जनावरे जबाह करीत आणि त्यांचे रक्त वहावित असत. ही मक्का आणि मदीनेच्या दर्म्यान एक मूर्ती होती. (फत्हुल कदीर) बनु खिजाअची ही खास मूर्ती होती. अज्ञान काळात औस आणि खजरज, येथूनच एहराम बांधत असत. आणि या मूर्तीचा तवाफ पण करीत असत(अयसरुत तफासीर व इब्ने कसीर) यांच्या शिवाय निरनिराळ्या इर्द गर्द आणखी पण पुष्कळ या मूर्त्या आणि पसरलेली होती. नबी सल्लल्लाहु अलैही व सल्लमनी मक्केच्या विजयानंतर आणि दुसऱ्या अनेक प्रसंगी, या मूर्ती, आणि दुसऱ्या सर्व मूर्तींचा शेवट केला. यांच्यावर जे घुमट आणि इमारती बांधण्यांत आल्या होत्या, त्या पाडून टाकण्यात आल्यात. त्या झाडांना कापून टाकण्यात आले, ज्यांचा आदर सन्मान केला जात होता. आणि ती सर्व चिन्हे आणि ठिकाणे नष्ट करून टाकण्यात आले जे मूर्तीपुजेच्या स्मृत्या होत्या. या कामासाठी आपण सल्लनी ह. खालीद, ह. अली, ह. अमरू बिन आस आणि ह. जरीर बिन अब्दुल्लाह्‌ वगैरे रिजवानुलाह्‌ अजमाईनला जेथे जेथे या मूर्त्या होत्या, पाठविले. आणि त्यांनी जाऊन त्यांना जमीन दोस्त करून, अरब च्या भूमीतून शिर्कचे नाव मिटवून टाकले.(इब्ने कसीर)

२) मक्केचे मुशरिक देवदूतांना अल्लाहच्या मुली म्हणत असत. हे याचे खंडन आहे. जसा की अनेक ठिकाणी विषय हा येऊन चुकला.

३) 'जीजा' सत्य आणि पुण्यप्रतिफला पासून दूर.

४) म्हणजे जे हे इच्छित होते की त्यांचे उपास्य त्यांना फायदा पोहोचावे आणि शिफारस करावी हे शक्यच नाही.

५) म्हणजे तेच होईल, जे तो इच्छील कारण कीं सर्व अधिकार त्याच्याच जवळ आहेत.

وَكَمْ مِّنْ مَّلَكٍ فِي السَّمٰوٰتِ لَا تُغْنِيْ شَفَاعَتُهُمْ شَيْـًٔا
إِلَّا مِنْ بَعْدِ أَنْ يَّأْذَنَ اللّٰهُ لِمَنْ يَّشَآءُ وَيَرْضٰى ﴿٢٦﴾

**आणि पुष्कळसे देवदूत आकाशांत आहेत, ज्यांची शिफारस काहीही फायदा पोहचवू शकत नाही; परंतु ही वेगळी गोष्ट आहे की अल्लाह् तआला आपल्या खुषी आणि मर्जीने, ज्यासाठी इच्छिल परवानगी देऊन देईल.[1] (२६)**

إِنَّ الَّذِيْنَ لَا يُؤْمِنُوْنَ بِالْاٰخِرَةِ لَيُسَمُّوْنَ الْمَلٰٓئِكَةَ
تَسْمِيَةَ الْأُنْثٰى ﴿٢٧﴾

**नि:संशय जे लोक परलोकावर विश्वास ठेवत नाहीत, ते देवदूतांना स्त्रियांची नावे ठेवतात. (२७)**

وَمَا لَهُمْ بِهٖ مِنْ عِلْمٍ ؕ إِنْ يَّتَّبِعُوْنَ إِلَّا الظَّنَّ ۚ
وَإِنَّ الظَّنَّ لَا يُغْنِيْ مِنَ الْحَقِّ شَيْـًٔا ﴿٢٨﴾

**वास्तविक त्यांना याचे काही ज्ञान नाही ते तर फक्त आपल्या अटकळीच्या मागे पडलेले आहेत; नि:संशय अटकळ, सत्याच्या मुकाबल्यात काही कामा येत नाही. (२८)**

فَأَعْرِضْ عَنْ مَّنْ تَوَلّٰى ۙ عَنْ ذِكْرِنَا وَلَمْ يُرِدْ إِلَّا
الْحَيٰوةَ الدُّنْيَا ﴿٢٩﴾

**तर आपण त्याच्याकडून तोंड फिरवून घ्या, जो आमच्या स्मरणाकडून तोंड फिरवील; आणि ज्यांचा इरादा इहलौकीक आयुष्याशिवाय आणखी काही नसेल. (२९)**

ذٰلِكَ مَبْلَغُهُمْ مِّنَ الْعِلْمِ ؕ إِنَّ رَبَّكَ هُوَ أَعْلَمُ بِمَنْ
ضَلَّ عَنْ سَبِيْلِهٖ ۙ وَهُوَ أَعْلَمُ بِمَنِ اهْتَدٰى ﴿٣٠﴾

**त्यांच्या ज्ञानाची पोहोच इतकीच आहे. तुमचा पालनकर्ता त्यांना खूप जाणतो, जे याच्या मार्गापासून भटकले आहेत. आणि त्याला पण तो चांगल्या प्रकारे जाणतों, जो सन्मार्गी लागला आहे. (३०)**

وَلِلّٰهِ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْأَرْضِ ۙ لِيَجْزِيَ الَّذِيْنَ
أَسَآءُوْا بِمَا عَمِلُوْا وَيَجْزِيَ الَّذِيْنَ أَحْسَنُوْا بِالْحُسْنٰى ﴿٣١﴾

**आणि अल्लाह्चेच आहे जे काही आकाशांत आहे. आणि जे काही पृथ्वीत आहे कीं, अल्लाहतआलाने कुकृत्य करणाऱ्यांना त्यांच्या कर्मांचा बदला द्यावा; आणि सुकृत्ये करणारांना चांगला बदला बहाल करावा.[2] (३१)**

الَّذِيْنَ يَجْتَنِبُوْنَ كَبٰٓئِرَ الْإِثْمِ وَالْفَوَاحِشَ
إِلَّا اللَّمَمَ ؕ إِنَّ رَبَّكَ وَاسِعُ الْمَغْفِرَةِ ؕ هُوَ أَعْلَمُ بِكُمْ
إِذْ أَنْشَأَكُمْ مِّنَ الْأَرْضِ وَإِذْ أَنْتُمْ أَجِنَّةٌ فِيْ بُطُوْنِ
أُمَّهٰتِكُمْ ۚ فَلَا تُزَكُّوْٓا أَنْفُسَكُمْ ؕ هُوَ أَعْلَمُ بِمَنِ اتَّقٰى ﴿٣٢﴾

**त्या लोकांना जे मोठ्या गुन्हयांपासून वाचतात, आणि निर्लज्जपणा पासून [3] सुध्दा शिवाय कोण्या लहान गुन्हयाच्या [4] नि:संशय तुझा पालनकर्ता फार व्यापक क्षमेवाला आहे. तो तुम्हांस चांगल्या प्रकारे जाणतो, जेव्हा की त्याने तुम्हास जमिनी पासून निर्माण केले. आणि जेव्हा तुम्ही आपल्या आईच्या पोटात बच्चे होता. [5] तर तुम्ही आपला सोवळेपणा स्वत:च सांगू नका [6] तोच अल्लाह्ला भिऊन वागणाऱ्यांना खूप जाणतो. (३२)**

أَفَرَءَيْتَ الَّذِيْ تَوَلّٰى ﴿٣٣﴾

**काय आपण त्याला पाहिले, ज्याने तोंड फिरविले, (३३)**

وَأَعْطٰى قَلِيْلًا وَّأَكْدٰى ﴿٣٤﴾

**आणि थोडेसे देऊन मग हात रोखून घेतला?[7] (३४)**

أَعِنْدَهٗ عِلْمُ الْغَيْبِ فَهُوَ يَرٰى ﴿٣٥﴾

**काय त्याच्या पाशी अदृष्टाचे ज्ञान आहे, की तो (सर्व काही) पाहत आहे?[8] (३५)**

१) म्हणजे दवदूत, जी अल्लाह्चे अती जवळचे सानिध्य प्राप्त सृष्टी आहे, त्यांना पण शिफारशीचा हक्क, फक्त त्याच लोकांकरीता मिळेल, ज्यांच्या करितांअल्लाह् पसंत करील जेव्हा अशी गोष्ट आहे, तर मग या दगडाच्या मूर्त्या, कशा प्रकारे कोणाची शिफारस करू शकतील? ज्यांच्याशी तुम्ही आस लाऊन बसला आहात. तसेच अल्लाहतआला मुशरिकांच्या बाबतीत, कोणाला शिफारस करण्याचा हक्क केव्हा देईल? जेव्हा कीं शिर्क त्याचे जवळ क्षमेस पात्र नाही.

२) म्हणजे सन्मार्ग दाखविणे आणि आडमार्गी भटकविणे त्याच्या हातात आहे. तो ज्याला इच्छितो त्याला सन्मार्ग बहाल करतो; आणि ज्याला इच्छितो त्याला गुमराहीच्या खड्ड्यात ढकलून देतो. कारण कीं सुकृत्ये करणारास त्याच्या सुकृत्यांचे प्रतिफळ आणि बदला दिला जावा. आणि कुकृत्ये करणाऱ्यास त्याच्या वाईट

कृत्यांचा बदला द्यावा.
३) 'कबाइर' कबीराचे अनेक वचन आहे. मोठ्या गुन्हयांच्या व्याख्येत मतभेद आहेत. बुहतेक ज्ञानवंताजवळ, प्रत्येक तो गुन्हा मोठा आहे, ज्यावर नरकाग्नीची धमकी आहे. किंवा ज्याला करणाऱ्याची सक्त निर्भत्सना कुरआन व हदीसमध्ये चर्चित आहे. आणि ज्ञानवंत लोक हे पण म्हणतात. कीं, लहान गुन्हयांवर दुराग्रह आणि सातत्य. पण, त्याला मोठा गुन्हा बनवून देतो. याशिवाय याचा अर्थ आणि स्वरूपाच्या छान बिन मध्ये, मतभेदाप्रमाणेच त्याच्या संख्येमध्ये सुद्धा स्पष्ट मतभेद आहेत. काही धर्मपंडीतांनी त्यांना पुस्तकांत एकत्र पण केले आहे. फवाहिश, फाहिशतून चे अनेक वचन आहे. निर्लज्जपणावर आधारित कृत्य, जसे व्याभिचार, समलिंगी संभोग वगैरे. काही म्हणतात ज्या गुन्हयांवर इहलौकिक शिक्षा आहे, ते सर्व निर्लज्जपणांत दाखल आहेत. आजकाल निर्लज्जपणाचे प्रदर्शन कारण की, फारच सार्वत्रिक होऊन गेले आहते. म्हणून निर्लज्जपणाला शिष्टाचार समजून घेण्यात आला आहे. येथपावेतो की आता मुसलमानांनी सुद्धा या निर्लज्ज शिष्टाचाराला' अंगीकारून घेतले आहे. म्हणून घरामध्ये टी.व्ही.,व्ही.सी.आर, वगैरे सर्रास आहेत. स्त्रियांनी न फक्त पर्द्याला सोडून दिले आहे. किंबहुना साज शृंगार करून रूप सौंदर्याचा पुतळा बनून आणि जाहिरात बनून बाहेर निघण्याची आपली पध्दतच बनवून घेतली आहे. एकत्रित शिक्षण, एकत्रित संस्था, एकत्रित सभा आणि दुसऱ्या अनेक प्रसंगी, स्त्री पुरूषांचे काही पण कारण नसताना एकत्र येणे व कारणाशिवाय (आपसात) संभाषण हे नित्याचे झाले आहे. वास्तविक हे सर्व 'निलर्ज्जपणात' दाखल आहे. ज्याच्या बाबतीत येथे सांगण्यात येते आहे, कीं ज्या लाकोंना क्षमा होणे आहे, ते मोठे गुन्हे आणि निर्लज्जपणाची कामे, यापासून वाचणारे असतील न कीं त्यांच्यात व्यस्त.
४) 'लमम्' चा शब्दकोषीय अर्थ आहे, कमी आणि लहान होणे. याच मुळे याचे हे उपयोग आहेत. 'अलम्म बिल मकान' (घरात थोडा वेळ थांबला) 'अल्म्म बिल् तआम' (थोडेसे खाल्ले.) अशाच प्रकारे कोण्या वस्तुला, निव्वळ स्पर्श करणे किंवा त्याच्याजवळ होणे, किंवा कोण्या कामाला एकदां किंवा दोनदां करणे, त्याच्यावर सातत्य आणि दुराग्रह न करणे, किंवा मनात निव्वळ विचार येऊन जाणे, हे सर्व प्रकार 'लमम्' म्हणविले जातात. (फत्हुल कदीर) याच्या या भावार्थ आणि उपयोगाच्या अनुषंगाने, याचा अर्थ लहान गुन्हे केला जातो. ज्याचा अर्थ हा आहे कीं, कोण्या मोठ्या गुन्हयाच्या करण्याचा इरादा परंतु मोठ्या गुन्हयांपासून वाचणे, किंवा कोण्या गुन्हयाचे एक दोनदा करणे, मग नेहमीसाठी त्याला सोडून देणे. किंवा कोण्या गुन्हयाचा निव्वळ मनात विचार करणे, पण प्रत्यक्ष त्याच्या जवळ न जाणे, हे सर्व लहान गुन्हे होतील;जे अल्लाहूतआला मोठ्या गुन्ह्यांपासून वाचण्याच्या बरकतीने क्षमा करून टाकेन.
५) 'अजिन्नतून' 'जनीनचे अनेक वचन आहे. जे पोटातील मुलास म्हटले जाते यासाठी की, हे लोकाच्या नजरेपासून लपलेले असते.
६) म्हणजे जेव्हा कीं याच्यापासून तुमची कोणी अवस्था आणि हरकत गुप्त नाहीं येथ पावेतो कीं, जेव्हा तुमही आईच्या पोटात होता. जेथे तुम्हास कोणी पहाण्यास समर्थ नव्हता. तेथे सुध्दा तुमच्या सर्व अहवालाने तो वाकब होता. तर मग आपले सोवळे पण सांगणे, आणि आपल्याच तोंडाने आपली स्तुती करण्याची काय आवश्यकता आहे? अर्थ असा आहे कीं, असे करू नका, की लोकांना दाखविण्यापासून तुम्ही वाचावे.
७) म्हणजे थोडेसे देऊन हात आवरून घेतला. किंवा थोडेसे आज्ञापालन करून मग मागे सरकून गेला. 'अक्दा' चा खरा अर्थ आहे कीं, जमीन खोदता खोदता कठीण दगड लागून जावा. आणि खोदणे अशक्य होऊन जावे. सर शेवटी खोदणे सोडून द्यावे. अशा वेळी म्हणतात. 'अक्दा'. येथूनच याचा उपयोग अशा माणसासाठी केला जाऊ लागला, ज्याने कोणाला काही द्यावे, परंतु पूर्ण न द्यावे, कोणी काम सुरू करून द्यावे, परंतु त्याला पूर्णत्वास न पोहोचवावे.
८) म्हणजे काय तो पहात आहे कीं, त्याने अल्लाहच्या मार्गात खर्च केला तर त्याची धनसंपत्ती संपून जाईल? नाही! अदृष्टाचे हे ज्ञान, त्याच्याजवळ नाही; किंबहुना तो खर्च करण्यापासून निव्वळ कंजुषी, आणि परलोकावर अजिबात विश्वास नसल्यामुळे करीत आहे. आणि अल्लाहच्या आज्ञापालनापासून तोंड फिरविण्याची कारणे पण हीच आहेत.

| | |
|---|---|
| काय त्याला त्या गोष्टीची बातमी दिली गेली नाही जी मूसाच्या ३६ | اَمْ لَمْ يُنَبَّاْ بِمَا فِىْ صُحُفِ مُوْسٰى ۟ۙ |
| आणि प्रामाणिक इब्राहीमच्या पुस्तकांत होती. ३७ | وَاِبْرٰهِيْمَ الَّذِىْ وَفّٰٓى ۟ۙ |
| कीं कोणी मनुष्य दुसऱ्या कोण्या (माणसाचे) ओझे उचलणार नाही. ३८ | اَلَّا تَزِرُ وَازِرَةٌ وِّزْرَ اُخْرٰى ۟ۙ |
| आणि हे की प्रत्येक माणसाकरिता फक्त तेवढेच आहे, ज्याचा प्रयत्न स्वत: त्याने केला.[१] ३९ | وَاَنْ لَّيْسَ لِلْاِنْسَانِ اِلَّا مَا سَعٰى ۟ۙ |
| आणि हे कीं, नि:संशय त्याचे प्रयत्न लवकरच पाहिले जातील.[२] ४० | وَاَنَّ سَعْيَهٗ سَوْفَ يُرٰى ۟ |
| मग त्याला पुरा पुरा बदला दिला जाईल. ४१ | ثُمَّ يُجْزٰىهُ الْجَزَآءَ الْاَوْفٰى ۟ۙ |
| आणि हे की, आपल्या पालनकर्त्याकडे पोहचणे आहे. ४२ | وَاَنَّ اِلٰى رَبِّكَ الْمُنْتَهٰى ۟ۙ |
| आणि हे की तोच हसवितो आणि तोच रडवितो. ४३ | وَاَنَّهٗ هُوَ اَضْحَكَ وَاَبْكٰى ۟ۙ |
| आणि हे की तोच मारतोआणि तोच जिववितो. ४४ | وَاَنَّهٗ هُوَ اَمَاتَ وَاَحْيَا ۟ۙ |
| आणि हे की त्यानेच जोडपे म्हणजे (च) नर व मादी निर्माण केले. ४५ | وَاَنَّهٗ خَلَقَ الزَّوْجَيْنِ الذَّكَرَ وَالْاُنْثٰى ۟ۙ |
| वीर्यबिंदुपासून जेव्हा कीं तो टपकविला जातो. ४६ | مِنْ نُّطْفَةٍ اِذَا تُمْنٰى ۟ |
| आणि हे कीं त्याच्याच कडे दुसऱ्यांदा जिवंत करणे आहे. ४७ | وَاَنَّ عَلَيْهِ النَّشْاَةَ الْاُخْرٰى ۟ۙ |
| आणि हे की तोच श्रीमंत बनवतो आणि मातब्बर बनवितो[३] ४८ | وَاَنَّهٗ هُوَ اَغْنٰى وَاَقْنٰى ۟ۙ |

१) म्हणजे ज्या प्रमाणे कोणी, दुसऱ्या कोणाच्या पापाला जबाबदार असणार नाही. अशाच प्रकारे त्याला परलोकात सुध्दा मोबदला, त्याच गोष्टींचा मिळेल, ज्यात त्याची आपली मेहनत असेल. (या मोबदल्याचा संबंध परलोकाशी आहे. इहलोकाशी नाही. जसे की काही समाजवादी विचारसरणीचे लोक, याचा हा भावार्थ काढून, गैरहजर जमीनदारी आणि भाडेपट्टीला अयोग्य ठरवितात.) तथापि या महावाक्याने त्या धर्म पंडीतांचा आधार घेणे बरोबर आहे, जे म्हणतात कीं, कुरआन ख्वानीचे पुण्य, मृतांस पोहचत नाहीं. यासाठी कीं, हे नमृताचे कर्म आहे, न की मेहनत. म्हणूनच रसूलुल्लाह ﷺ नी, आपल्या उम्मतला मृतांकरिता, न कुरआन ख्वानीला प्रोत्साहन दिले न कोण्या स्पष्ट कुरआनी वाक्याने किंवा कोण्या स्पष्ट इशाऱ्याने, याच्याकडे मार्गदर्शन केले. अशाचप्रकारे सहाबा कराम رضي الله عنهم कडून सुध्दा हे कर्म न झाल्याची नोंद आहे. जर हे कर्म, चांगले कर्म असते, तर सहाबांनी याचा जरूर अंगिकार केला असता आणि उपासना आणि अल्लाहची जवळीक साधण्यासाठी, स्पष्ट आदेशाचे असणे आवश्यक आहे. याच्यात राय आणि कयास (मत व अंदाज) चालू शकत नाही. तथापि दुआ आणि दानधर्माचे पुण्य मृतास पोहचते. यावर सर्व धर्मपंडीतांचे एकमत आहे. कारण की हे अल्लाहकडून साबित आहे. आणि ती जी हदीस आहे कीं, मेल्यानंतर तीन गोष्टींची शृंखला चालू राहते. तर ते सुध्दा मुळांत, मनुष्याची आपली कर्मे असतात. जी कुठल्याना कुठल्या पध्दतीने, त्याच्या मृत्युनंतर सुध्दा चालू राहतात. संततीला, नबी ﷺ नी, स्वत:माणसाची आपली स्वत:ची कमाई ठरविले आहे. (अल्निसाई) सदक-ए- जारिया, वक्फ प्रमाणे मनुष्याच्या आपल्या कर्माची फळे आहेत, ''आणि आम्ही लिहीत जातो, ती कर्मे सुध्दां, ज्यांना लोक पुढे पाठवितात.'' (सू.यासीन-१२) अशाच प्रकारे ते ज्ञान ज्याचे त्याने लोकांत प्रकटीकरण आणि जाहीर केले. आणि लोकांनी त्याचे अनुकरण केले. तर हा याचा प्रयत्न आणि कर्म आहे. आणि हदीसे नबवी प्रमाणे, ''अनुपालन करणाऱ्यांचे पुण्यप्रतिफळ पण त्याला पोहचत राहील.''(अबुदाऊद,) म्हणून ही हदीस, या महावाक्याच्या विरूध्द नाही. (इब्ने कसीर)

२) म्हणजे जगात त्याने चांगले किंवा वाईट जे पण केले, लपून केले किंवा जग जाहीर केले, कयामतच्या दिवशी ते पुढे येऊन जाईल. आणि त्याच्यावर त्याला पूर्ण बदला दिला जाईल.

३) म्हणजे कोणाला एवढी श्रीमंती देतो कीं, तो कोणाचा गरजू राहत नाही. आणि त्याच्या सर्व आवश्यकता पूर्ण होऊन जातात. आणि कोणाला एवढे धन देतो की त्याच्या जवळ आवश्यकते पेक्षा जास्त शिल्लक रहाते, आणि तो याला साठवून ठेवतो.

| | |
|---|---|
| وَاَنَّهٗ هُوَ رَبُّ الشِّعْرٰى ﴿٤٩﴾ | आणि हे की तोच 'लुब्धक' (ताऱ्याचा) पालनकर्ता आहे.[१] ४९ |
| وَاَنَّهٗۤ اَهْلَكَ عَادَا ۨالْاُوْلٰى ﴿٥٠﴾ | आणि हे कीं त्यानेच पूर्वीच्या 'आद'चा नाश केला आहे.[२] ५० |
| وَثَمُوْدَاۡ فَمَاۤ اَبْقٰى ﴿٥١﴾ | आणि समूदचा पण(ज्यांच्यातून) एकाला पण शिल्लक ठेवले नाही. ५१ |
| وَقَوْمَ نُوْحٍ مِّنْ قَبْلُ ؕ اِنَّهُمْ كَانُوْا هُمْ اَظْلَمَ وَاَطْغٰى ﴿٥٢﴾ | आणि याच्यापूर्वी 'नूह' च्या लोकांना, खचित्च ते मोठेच जालीम आणि शिरजोर होते. ५२ |
| وَالْمُؤْتَفِكَةَ اَهْوٰى ﴿٥٣﴾ | आणि मुअतफिकाला (शहर किंवा पालथलेल्या वस्त्यांना) त्यानेच पालथ्या[३] घातल्या. ५३ |
| فَغَشّٰىهَا مَا غَشّٰى ﴿٥٤﴾ | मग त्यावर जे पसरवले ते पसरले.[४] ५४ |
| فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكَ تَتَمَارٰى ﴿٥٥﴾ | तर हे मनुष्या! तू आपल्या पालनकर्त्याच्या कोणत्या कोणत्या देणग्यांत झगडशील?[५] ५५ |
| هٰذَا نَذِيْرٌ مِّنَ النُّذُرِ الْاُوْلٰى ﴿٥٦﴾ | हे (पैगंबर) भय सुचविणारे आहेत, पहिल्या भय सुचविण्याऱ्यांमधून ५६ |
| اَزِفَتِ الْاٰزِفَةُ ﴿٥٧﴾ | कयामत जवळ येऊन पोहचली ५७ |
| لَيْسَ لَهَا مِنْ دُوْنِ اللّٰهِ كَاشِفَةٌ ﴿٥٨﴾ | अल्लाहच्या शिवाय (तिचा निश्चित वेळ) सांगणारा आणखी कोणी नाहीं ५८ |
| اَفَمِنْ هٰذَا الْحَدِيْثِ تَعْجَبُوْنَ ﴿٥٩﴾ | तर काय तुम्ही या गोष्टीचे आश्चर्य करतात?[६] ५९ |
| وَتَضْحَكُوْنَ وَلَا تَبْكُوْنَ ﴿٦٠﴾ | आणि हसत आहात? रडत नाहीत? ६० |
| وَاَنْتُمْ سٰمِدُوْنَ ﴿٦١﴾ | (किंबहुना) तुम्ही खेळत आहात ६१ |
| فَاسْجُدُوْا لِلّٰهِ وَاعْبُدُوْا ﴿٦٢﴾ | आता अल्लाहसमोर सजदा करा. आणि (त्याचीच) उपासना करा[७] ६२ |

१) मालक तर तो प्रत्येक वस्तूचा आहे. या ठिकाणी या ताऱ्याचे नाव यासाठी घेण्यात आले कीं, काही अरब कबीले याची पुजा करीत असत.

२) आदच्या लोकांना पहिले यासाठी म्हटले गेले की, हे समूदच्या पूर्वी झाले. किंवा यासाठी कीं, नूहच्या लोकांनतर सर्वांत पहिले, हे लोक नष्ट केले गेले. काही म्हणतात, आद नावाचे दोन समाज होऊन गेले आहेत. हा पहिला आहे. ज्याला चक्रीवादळाने नष्ट करण्यात आले. जेव्हा की दुसरा आद समाज, कालचक्राबरोबर वेगवेगळ्या नावांनी चालत आणि पांगत अस्तित्वात राहिला.

३) याच्याने अभिप्रेत ह. लूत ﷺ च्या वस्त्या आहेत. ज्यांना त्यांच्यावर पालथ्या घालून देण्यात आले.

४) म्हणजे याच्यानंतर त्यांच्यावर दगडांचा वर्षाव झाला.

५) किंवा शंका घेईल आणि त्यांना खोटे म्हणेल. जेव्हा की ती एवढी सर्वसाधारण आणि स्पष्ट आहेत. की त्यांना नाकारणे शक्य नाही. आणि लपविणे सुध्दा.

६) गोष्टीने अभिप्रेत कुरआन करीम आहे. म्हणजे याच्यावर तुम्ही आश्चर्य आणि याचा उपहास करता? वास्तविक यांच्यात आश्चर्य करण्यासारखी काही गोष्ट नाही न उपहास करण्यासाठी न खोटे ठरविण्यासारखी.

७) हा मुशरिकीन आणि खोटे म्हणणाऱ्यासाठी, कान उघाडणी करता हुकूम दिला. म्हणजे जेव्हा त्यांचा मामला असा आहे कीं, ते कुरआनाला मानण्याऐवजी, त्याचा उपहास आणि टिंगल करतात; आणि आमच्या पैगंबराच्या सांगण्याचा आणि उपदेशाचा त्यांच्यावर काही परिणाम होत नाही; तर हे मुसलमानांनो! तुम्ही अल्लाहच्या समक्ष झुकून आणि त्याच्या उपासना आणि आज्ञापालनांचे प्रदर्शन करून कुरआनाच्या आदर सन्मानाची व्यवस्था करा. म्हणून या हुकुमाच्या आज्ञापालनात नबी करीम ﷺ नी आणि सहाबा किराम ﷺ नी सजदा केला. येथपावेतो कीं त्यावेळी सभेत असलेल्या काफिरांनी सुध्दा सजदा केला जसे हदीशींमध्ये सुध्दा आहे.

महावाक्ये ५५ | (५४) सू. अल-कमर | रुकूअ ३

آياتها ٥٥ (٥٤) سُورَةُ الْقَمَرِ مَكِّيَّةٌ (٣٧) رُكُوعَاتُهَا ٣

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

اِقْتَرَبَتِ السَّاعَةُ وَانْشَقَّ الْقَمَرُ ①

**कयामत जवळ येऊन पोहचली;** (१) **आणि चंद्र फाटून गेला.** (२) ①

وَاِنْ يَّرَوْا اٰيَةً يُّعْرِضُوْا وَيَقُوْلُوْا سِحْرٌ مُّسْتَمِرٌّ ②

**हे जर कोणी चमत्कार पाहतात तर तोंड फिरवून घेतात; आणि सांगून टाकतात की, (हा) जोरदार चालणारा जादू आहे.** (३) ②

وَكَذَّبُوْا وَاتَّبَعُوْٓا اَهْوَآءَهُمْ وَكُلُّ اَمْرٍ مُّسْتَقِرٌّ ③

**त्यांनी खोटे ठरवले आणि आपल्या मनेच्छेचे अनुकरण केले. आणि प्रत्येक काम ठरलेल्या वेळेवर निश्चित आहे.** (४) ③

وَلَقَدْ جَآءَهُمْ مِّنَ الْاَنْۢبَآءِ مَا فِيْهِ مُزْدَجَرٌ ④

**खचित्‌च यांच्याजवळ ती बातमी येऊन चुकली आहे** (५) **जित तंबीचा उपदेश आहे.** (६) ④

حِكْمَةٌۢ بَالِغَةٌ فَمَا تُغْنِ النُّذُرُ ⑤

**आणि पूर्ण शहाणपणाची गोष्ट आहे;** (७) **परंतु या भय सुचविणाऱ्या गोष्टींनी सुध्दा काही फायदा दिला नाही** (८) ⑤

हा अध्याय पण सुध्दा त्याच अध्यायांमधून आहे, ज्यांना रसूलुल्लाह् ﷺ ईदींच्या नमाजींमधून पढत असत.

१) एक तर त्या काळाच्या अनुषंगाने जो पार पडून गेला, कारण की जो बाकी आहे तो थोडासा आहे. दुसरे, प्रत्येक येणारी वस्तू जवळच आहे. म्हणून नबी ﷺ नी सुध्दाआपल्या बाबतीत फर्माविले कीं, माझे अस्तित्व पण कयामत जवळ असण्याचे द्योतक आहे. म्हणजे माझ्या आणि कयामतच्या दर्म्यान कोणी पैगंबर येणार नाही.

२) हा तो चमत्कार आहे जो मक्केवाल्यांच्या मागणीवर दाखवण्यात आला. चंद्राचे दोन तुकडे होऊन गेलेत. येथपावेतो की लोकांनी हिराअ ला त्याच्या दर्म्यान पाहिले. म्हणजे त्याचा एक तुकडा, पर्वताच्या त्या बाजूला आणि एक तुकडा या बाजूला होऊन गेला. (स.बुखारी,स.मुस्लिम) बहुतेक पूर्वींच्या आणि मागील लोकांचा हाच मसलक आहे. (फत्हुल कदीर) इमाम इब्ने कसीर लिहितात, ''धर्मपंडीता दर्म्यान या गोष्टीवर मतैक्य आहे, की चंद्राचे फाटून जाणे, ﷺ च्या काळात घडले. आणि हे आपल्या स्पष्ट चमत्कारांमधून आहे. बरोबर सनदीने सिध्द हदीशी क्रमश: यावर प्रमाण करतात.

३) म्हणजे कुरैशने ईमान आणण्याऐवजी, याला जादू ठरवून, आपल्या अपेक्षांची चाल कायम ठेवली.

४) हे मक्केच्या काफिरांचे खोटे म्हणणे आणि मनेच्छेच्या अनुकरणाचे खंडन आणि त्याचे निरर्थक असणे याबाबतीत सांगितले कीं, प्रत्येक कामाचा एक उद्देश्य आणि शेवट आहे, ते काम चांगले असो अथवा वाईट म्हणजे सरशेवटी त्याचा परिणाम निघेलच. चांगल्या कामाचा परिणाम चांगला, आणि वाईट कामाचा वाईट. हा परिणाम जगात पण दिसू शकतो, जर अल्लाह्ची तशी मर्जी असेल; नाही तर परलोकात तर नक्कीच आहे.

५) म्हणजे मागील जनसमूहांना गारद करून टाकले, जेव्हा त्यांनी खोटे ठरवले.

६) म्हणजे यांच्यात धडा घेणे व बोध आहे. कोणी यापासून धडा घेऊन शिर्क आणि गुन्हयांपासून वाचू इच्छेल, तर वाचू शकतो.

७) म्हणजे अशी गोष्ट जी बर्बादी कडून फिरवून देणारी आहे. किंवा हे कुरआन परीपूर्ण ज्ञान आहे, ज्यातं कोणी व्यत्य किंवा दोष नाही. किंवा अल्लाहूतआला ज्याला हिदायत देईल, आणि ज्याला मार्गभ्रष्ट करेल. यांत मोठेच शहाणपण आहे, ज्याला तोच जाणतो.

८) म्हणजे ज्याच्या करिता अल्लाह्ने दुर्भाग्य लिहून दिले आहे; आणि त्याच्या अंत:करणावर मोहोर लावून दिली आहे, त्याला पैगंबराचे भिववणे काय फायदा पोहचवू शकते? त्याच्याकरीता तर 'इन्‌जार सवाउन अलैहिम अअन्‌जरतहुम अम्‌ लम्‌ तुन्‌ जिर हुम्‌'' वालीच गोष्ट आहे. जवळ जवळ याच भावार्थाचे हे वाक्य आहे. ''आपण सांगून द्या कीं, पूर्ण हुज्जत अल्लाह्चीच राहिली. मग जर तो इच्छितो तर तुम्हा सर्वांस सरळ मार्गावर घेऊन येता.'' (सू.अन्आम- १४९)

| | |
|---|---|
| (तर हे पैगंबरा) ! तुम्ही या लोकांकडून एकीकडे व्हा ज्या दिवशी एक बोलाविणारा अप्रिय गोष्टीकडे बोलावील.[१] ⑥ | فَتَوَلَّ عَنْهُمْ ۘ يَوْمَ يَدْعُ الدَّاعِ اِلٰى شَيْءٍ نُّكُرٍ ۙ﴿٦﴾ |
| हे डोळे नमलेले थडग्यांतून अशा प्रकारे निघून पडतील की जणू ते पसरलेले टोळ आहेत.[२] ⑦ | خُشَّعًا اَبْصَارُهُمْ يَخْرُجُوْنَ مِنَ الْاَجْدَاثِ كَاَنَّهُمْ جَرَادٌ مُّنْتَشِرٌ ۙ﴿٧﴾ |
| बोलाविणाऱ्याकडे धाव घेत असतील.[३] आणि काफिर म्हणतील हा दिवस तर फारच कठीण दिवस आहे. ⑧ | مُّهْطِعِيْنَ اِلَى الدَّاعِ ۭ يَقُوْلُ الْكٰفِرُوْنَ هٰذَا يَوْمٌ عَسِرٌ ﴿٨﴾ |
| यांच्यापूर्वी नूहच्या लोकांनी सुध्दांआमच्या सेवकाला खोटे म्हटले होते आणि खुळा सांगून त्याला झिडकारले होते.[४] ⑨ | كَذَّبَتْ قَبْلَهُمْ قَوْمُ نُوْحٍ فَكَذَّبُوْا عَبْدَنَا وَقَالُوْا مَجْنُوْنٌ وَّازْدُجِرَ ﴿٩﴾ |
| तर मग त्याने आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना केली, मी जेरीस आलो आहे तू माझी मदत कर. ⑩ | فَدَعَا رَبَّهٗٓ اَنِّىْ مَغْلُوْبٌ فَانْتَصِرْ ﴿١٠﴾ |
| तर आम्ही मुसळधार पावसाने आकाशाची व्दारे उघडून दिली.[५] ⑪ | فَفَتَحْنَآ اَبْوَابَ السَّمَاۗءِ بِمَاۗءٍ مُّنْهَمِرٍ ﴿١١﴾ |
| आणि जमिनीचे झरे वाहवून दिले, तर या कामावर जे ठरवून केले गेले होते, पाणी खूप जमा होऊन गेले.[६] ⑫ | وَّفَجَّرْنَا الْاَرْضَ عُيُوْنًا فَالْتَقَى الْمَاۗءُ عَلٰٓي اَمْرٍ قَدْ قُدِرَ ﴿١٢﴾ |
| आणि आम्ही त्याला तख्ते आणि खिळ्यांवाल्या (नावे) वर स्वार करून घेतले.[७] ⑬ | وَحَمَلْنٰهُ عَلٰي ذَاتِ اَلْوَاحٍ وَّدُسُرٍ ﴿١٣﴾ |
| जी आमच्या डोळ्यांसमोर चालत होती; बदला त्याच्याकडून, ज्याच्याशी कुफ्र केले गेले होते. ⑭ | تَجْرِيْ بِاَعْيُنِنَا ۚ جَزَاۗءً لِّمَنْ كَانَ كُفِرَ ﴿١٤﴾ |
| आणि नि:संशय आम्ही या घटनेला निशाणी बनवून बाकी ठेवले तर कोणी आहे कीं यापासून बोध घेईल?[८] ⑮ | وَلَقَدْ تَّرَكْنٰهَآ اٰيَةً فَهَلْ مِنْ مُّدَّكِرٍ ﴿١٥﴾ |
| तर माझी शिक्षा आणि माझ्या भय सुचविणाऱ्या गोष्टी कशा राहिल्यात? ⑯ | فَكَيْفَ كَانَ عَذَابِيْ وَنُذُرِ ﴿١٦﴾ |

१) 'यौम' च्या पूर्वी 'उज्कुर' महजुफ आहे. म्हणजे त्या दिवसाची आठवण करा. 'नुकुर' फारच भयानक आणि दहशत बसविणारे, अभिप्रेत हशरचे मैदान आणि हिशेबाचा अहवाल देण्यासाठी उभे रहाणे, आणि कसोट्या आहेत.

२) म्हणजे थडग्यातून निघून ते अशा रीतीने पसरतील आणि हिशेब देण्याच्या जागेकडे, अशा प्रकारे फारच जलद् जातील जणू टोळ धाड आहे, जी क्षणार्धांत मोठ्या वातावरणात पसरून जाते.

३) 'मुह्तिईन' 'मुस्रिईन' धावतील, मागे राहणार नाहीत.

४) 'वज् दुजिर्' 'वज्तुजिर' आहे. म्हणजे नूहच्या लोकांनी नूह عليه السلام ला खोटे ठरविले नाही, किंबहुना त्यांना झिडकारले, भीती दाखविली आणि धमक्या सुध्दा दिल्या जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''हे नूहा! जर तू माघार घेतली नाही, तर तुला धोंडमार करून टाकण्यात येईल.'' (सू.शुअरा- ११६)

५) 'मुन्हमिर' भरपूर किंवा जोरदार, हमर, सब्ब (वाहणे) च्या अर्थात येते. असे म्हणतात कीं,........चाळीस दिवसांपर्यंत खूप जोरदार पाऊस पडत राहिला.

६) म्हणजे आकाश आणि पृथ्वीच्या पाण्याने मिळून ते काम पूर्ण करून टाकले. जे अनादि कालात लिहून टाकले गेले होते. म्हणजे प्रलय बनून सर्वांना बुडवून टाकले.

७) दुसूर दिसार चे अनेक वचन आहे. त्या दोऱ्या ज्याने नावेच्या फळ्या बांधल्या गेल्या किंवा ते खिळे किंवा मेखा, ज्याच्याने नावेला जोडण्यात आले.

८) मुद्दकीर अर्थ आहे धडा घेणारा आणि उपदेश ग्रहण करणारा (फतहुल कदीर)

وَلَقَدْ يَسَّرْنَا الْقُرْاٰنَ لِلذِّكْرِ فَهَلْ مِنْ مُّدَّكِرٍ ﴿١٧﴾

**आणि नि:संशय आम्ही कुरआनाला समजण्याकरिता, सोपे करून दिले आहे;[१] तर काय कोणी बोध घेणारा नाही? (१७)**

كَذَّبَتْ عَادٌ فَكَيْفَ كَانَ عَذَابِيْ وَنُذُرِ ﴿١٨﴾

**'आद' च्या लोकांनी पण खोटे ठरवले, तर कशी राहिली माझी शिक्षा आणि माझ्या भय सुचविणाऱ्या गोष्टी (१८)**

اِنَّآ اَرْسَلْنَا عَلَيْهِمْ رِيْحًا صَرْصَرًا فِيْ يَوْمِ نَحْسٍ مُّسْتَمِرٍّ ﴿١٩﴾

**आम्ही त्यांच्यावर सोसाट्याने सतत चालणारे वारे एका दुदैवी दिवशी पाठवून दिले[२] (१९)**

تَنْزِعُ النَّاسَ كَاَنَّهُمْ اَعْجَازُ نَخْلٍ مُّنْقَعِرٍ ﴿٢٠﴾

**जे लोकांना उचलून उचलून पटकून देत होते. जणू की मुळापासून कापलेले खजुरीच्या वृक्षांची खोडे आहेत.[३] (२०)**

فَكَيْفَ كَانَ عَذَابِيْ وَنُذُرِ ﴿٢١﴾

**तर कशी राहिली माझी शिक्षा आणि माझे भिवविणे? (२१)**

ع ١ / ٢٢ / ٨ وَلَقَدْ يَسَّرْنَا الْقُرْاٰنَ لِلذِّكْرِ فَهَلْ مِنْ مُّدَّكِرٍ ﴿٢٢﴾

१ / २२ / ८ **नि:संशय आम्ही कुरआनाला समजण्याकरीता सोपे करून दिले आहे. तर कोणी आहे की, यापासून बोध घेईल? (२२)**

كَذَّبَتْ ثَمُوْدُ بِالنُّذُرِ ﴿٢٣﴾

**'समूद' च्या लोकांनी भिवविणाऱ्यांना खोटे समजले; (२३)**

فَقَالُوْٓا اَبَشَرًا مِّنَّا وَاحِدًا نَّتَّبِعُهٗٓ اِنَّآ اِذًا لَّفِيْ ضَلٰلٍ وَّسُعُرٍ ﴿٢٤﴾

**आणि म्हणू लागले काय आमच्यातून एका माणसाचे आम्ही आज्ञापालन करू लागावे? तेव्हा तर आम्ही खचित्‌च चुकीत आणि खुळेपणात पडलेले असूं[४] (२४)**

१) म्हणजे त्याच्या उद्देश्य व अर्थाला समजणे. त्यापासून धडा आणि बोध घेणे. आणि त्याला तोंडी पाठ करणे, आम्ही सोपे करून दिले आहे. म्हणून हे सत्य आहे की, कुरआन करीम चमत्कार आणि साहित्यात दर्जात पोहचलेल्याच्या अनुषंगाने फारच उच्च दर्जाचे पुस्तक असून सुध्दा कोणी मनुष्य थोडेसे लक्ष देईल, तर तो अरबी व्याकरण आणि अर्थ, साहित्याची पुस्तके, वांचल्याशिवाय सुध्दा त्याला सहजतेने समजून घेतो. अशाच प्रकारचे हे जगातील एकच पुस्तक आहे, जे शब्द न् शब्द पाठ करून घेतले जाते. नाहीतर लहानात लहान पुस्तकाला पण अशा प्रकारे पाठ करुन घेणे, आणि त्याला लक्षात ठेवणे, फारच कठीण आहे. आणि मनुष्य जर आपले अंत: करण आणि बुद्धी च्या खिडक्या उघड्या ठेवून त्याला बोध घेण्याच्या दृष्टीने वाचेल, उपदेश ग्रहण करणाऱ्या कानांनी ऐकेल, आणि समजणाऱ्या अंत:करणाने, त्यावर मनन करेल, तर इहलोक आणि परलोकाच्या सद्‌भाग्याचे दरवाजे, त्याच्यासाठी उघडून जातात. आणि हे याच्या अंत:करण आणि बुध्दीच्या गहराईत ऊतरून कुफ्र आणि पापाचरणाच्या संपूर्ण घाणीला स्वच्छ करून देते.

२) असे म्हणतात की बुधवारची संध्याकाळ होती. हा सोसाट्याचा वारा सों सों करत वाहण्याला सुरवात झाली. मग सतत, ७ रात्री आणि ८ दिवस तो सतत वहात होता. हा वारा, घरे आणि किल्ल्यात बंद असलेल्या माणसांना तेथून उचलायचा, आणि अशा प्रकारे त्यांना जमिनीवर पटकावयाचा की त्यांची डोकी त्यांच्या शरीरापासून वेगळी होऊन जात. हा दिवस त्यांच्याकरिता शिक्षेच्या अनुषंगाने दुर्दैवी (शापित) सिध्द झाला. याचा हा अर्थ नाही कीं, बुधवारच्या दिवशी किंवा कोण्या आणखी दिवसात दुर्दैव (शाप) आहे. जसे की काही लोक समजतात. 'मुसतमिर्र' चा अर्थ ही शिक्षा त्यावेळ पर्यंत चालू राहिली, जो पर्यंत सर्व ठार झाले नाहीं.

३) ही, अंगकाठीच्या उंची बरोबर, त्यांची असहाय्यता आणि लाचारी पण दिसत आहे, की अल्लाहच्या शिक्षेसमोर ते काहीच करू शकले नाहीत. वास्तविक त्यांना आपल्या शक्ती व सामर्थ्यावर फारच गर्व होता. 'अअजाज' अजीजून चे अनेक वचन आहे. जे कोण्या वस्तुंच्या मागल्या भागाला म्हणतात. 'मुनकईर' आपल्या मुळापासून उखडून जाणारा आणि कापला जाणारा, म्हणजे खजुरीच्या त्या खोडांसारखा जे आपल्या मुळापासून उखडून आणि कापून चुकले असतील; त्याची प्रेते जमिनीवर पडलेली होती.

४) म्हणजे एका मनुष्याला पैगंबर मानून घेणे, त्यांच्या जवळ बहकणे आणि खुळेपणा आहे. सुअुर सअीरचे अनेक वचन आहे. म्हणजे आगीची ज्वाला. येथे त्याला खुळेपणा किंवा काठिण्य आणि शिक्षेच्या भावार्थात, उपयोगात आणले गेले आहे.

| | |
|---|---|
| ءَاُلْقِیَ الذِّکْرُ عَلَیْہِ مِنْۢ بَیْنِنَا بَلْ ھُوَکَذَّابٌ اَشِرٌ ﴿٢٥﴾ | काय आमच्या सर्वांच्या दर्म्यान फक्त याच्यावरच 'वह्य' उतारले गेले? नाही किंबहुना तो खोटी शेखी मिरविणारा आहे.[१] ㉕ |
| سَیَعْلَمُوْنَ غَدًا مَّنِ الْکَذَّابُ الْاَشِرُ ﴿٢٦﴾ | आता सर्व जाणून घेतील, उद्याला की कोण खोटे आणि बढाईखोर होता?[२] ㉖ |
| اِنَّا مُرْسِلُوا النَّاقَةِ فِتْنَةً لَّھُمْ فَارْتَقِبْھُمْ وَاصْطَبِرْ ﴿٢٧﴾ | नि:संशय आम्ही यांची कसोटी घेण्यासाठी उंटीण पाठवू.[३] तर (हे सॉलेहा!) तू यांची वाट पहा आणि सहनशिलता पत्कर.[४] ㉗ |
| وَنَبِّئْھُمْ اَنَّ الْمَآءَ قِسْمَةٌۢ بَیْنَھُمْ ۚ کُلُّ شِرْبٍ مُّحْتَضَرٌ ﴿٢٨﴾ | (पण) होय! यांना सांगून दे कीं, पाण्याची यांच्यात वाटणी झालेली आहे.[५] प्रत्येक आपल्या पाळीवर हजर राहील[६] ㉘ |
| فَنَادَوْا صَاحِبَھُمْ فَتَعَاطٰی فَعَقَرَ ﴿٢٩﴾ | त्यांनी आपल्या सोबत्याला बोलाविले,[७] ज्याने (उंटिणीवर)[८] हात टाकला आणि घोड शिरा कापून टाकल्या. ㉙ |
| فَکَیْفَ کَانَ عَذَابِیْ وَنُذُرِ ﴿٣٠﴾ | तर कशी झाली शिक्षांआणि माझे भिवविणे? ㉚ |
| اِنَّآ اَرْسَلْنَا عَلَیْھِمْ صَیْحَةً وَّاحِدَةً فَکَانُوْا کَھَشِیْمِ الْمُحْتَظِرِ ﴿٣١﴾ | आम्ही त्यांच्यावर एक (भयंकर) गर्जना पाठविली, तर ते असे होऊन गेले, जसे काटयाचे पालथे घातलेले कुंपण[९] ㉛ |
| وَلَقَدْ یَسَّرْنَا الْقُرْاٰنَ لِلذِّکْرِ فَھَلْ مِنْ مُّدَّکِرٍ ﴿٣٢﴾ | आणि आम्ही कुरआनाला समजण्याकरिता सोपे करून दिले आहे. तर कोणी आहे की, यापासून बोध घेईल? ㉜ |
| کَذَّبَتْ قَوْمُ لُوْطٍۭ بِالنُّذُرِ ﴿٣٣﴾ | लूतच्या लोकांनी सुध्दा भिवविणाऱ्यांना खोटे ठरवले ㉝ |

१) 'अशिर', गर्विष्ठच्या अर्थात म्हणजे लबाडीत मर्यादेच्या बाहेर जाणारा, म्हणजे यांना खोटेपण बोलले आहे ते पण फार मोठे, की माझ्यावर वह्य येते. बरे! आमच्यातून फक्त याच्या एकावरच वह्य येणे होते!! किंवा या मार्फत, आमच्यावर याचे मोठेपण ढाखविण्याचा याचा उद्देश्य होता.

२) हे स्वत: पैगंबराबरोबर ढोषारोपण करणारे, की ह. सॉलेह عليه السلام? ज्यांना अल्लाह्ने वह्य आणि पैगंबरी बहाल केली. 'गदन' ने अभिप्रेत कयामतचा दिवस आहे. किंवा जगात त्यांच्याकरिता शिक्षेचा निश्चित केलेला दिवस आहे.

३) हे ईमान आणतात किंवा नाही? ही तीच उंटीण आहे जी अल्लाह्ने स्वत: त्यांच्या सांगण्यावर ढगडाच्या एका शिळेतून काढली होती.

४) म्हणजे पहा की हे आपल्या वायद्याप्रमाणे ईमानाचा मार्ग अनुसरता की नाही? आणि त्यांच्या त्रास देण्याला सहन कर.

५) म्हणजे एक दिवस उंटीणचा पाणी पिण्याचा आणि एक दिवस लोकांच्या पाणी घेण्याचा.

६) अर्थ आहे, प्रत्येकाचा वाटा, त्यांच्यासाठीच खास आहे, जो आपआपल्या पाळीवर हजर होऊन वसूल करून घ्यावा. ढुसऱ्याने त्या दिवशी येऊ नयें. 'शूर्ब', म्हणजे पाण्याचा वाटा.

७) म्हणजे ज्याला त्यांनी, उंटीणला ठार करण्यासाठी तयार केले होते; ज्याचे नाव कुढार बिन सालिफ सांगण्यात येते. त्याला बोलाविले की त्याने आपले काम करावे.

८) त्याने उंटीणला पकडले आणि तिचे पाय कापून टाकले, आणि मग जबाह करून टाकले. काहींनी 'फतआता' चा अर्थ तर त्याने धाडस केले.

९) 'हज़ीरतून:' 'महजुरतून' च्या अर्थात, कुंपण जे कोरड्या काटेरी फांद्या आणि लाकडांनी जनावरापासून संरक्षणासाठी बनविले जाते. 'मुहूतजिर' म्हणजे कुंपन बनविणारा. हशीम म्हणजे वाळलेले गवत किंवा वाळलेले कापलेले शेत म्हणजे ज्या प्रमाणे एका कुंपण बनविणाऱ्याच्या वाळलेल्या काठ्या आणि झाडे सतत तुडविल्यामुळे चुरा चुरा होऊन जातात; ते पण या कुंपणासारखे आमच्या शिक्षेने चुरा चुरा होऊन गेले.

إِنَّآ أَرْسَلْنَا عَلَيْهِمْ حَاصِبًا إِلَّآ ءَالَ لُوطٍ ۖ نَّجَّيْنَٰهُم بِسَحَرٍ ﴿٣٤﴾

नि:संशय आम्ही त्यांच्यावर दगड वर्षविणारा वारा पाठविला [१] लूतच्या घरवाल्याशिवाय त्यांना आम्ही सकाळच्या वेळी, [२] वाचवून घेतले. (३४)

نِّعْمَةً مِّنْ عِندِنَا ۚ كَذَٰلِكَ نَجْزِى مَن شَكَرَ ﴿٣٥﴾

आपल्या उपकाराने [३] प्रत्येक आभार मानणाऱ्याला आम्ही अशाच प्रकारे वाचवून घेत असतो. (३५)

وَلَقَدْ أَنذَرَهُم بَطْشَتَنَا فَتَمَارَوْا۟ بِٱلنُّذُرِ ﴿٣٦﴾

खचित्च लूतने त्यांना आमच्या पकडीपासून भिवविले होते. [४] परंतु त्यांनी भिवविणाऱ्यामध्ये, (शंका कुशंका) आणि भांडण केले. [५] (३६)

وَلَقَدْ رَٰوَدُوهُ عَن ضَيْفِهِۦ فَطَمَسْنَآ أَعْيُنَهُمْ فَذُوقُوا۟ عَذَابِى وَنُذُرِ ﴿٣٧﴾

आणि लूतला मिळवून त्यांच्या पाहुण्यांकडून गाफील करू इच्छिले [६] तेव्हा आम्ही त्यांचे डोळे आंधळे करून टाकले. [७] (आणि सांगून टाकले आता) माझी शिक्षा आणि माझ्या भिवविण्याची मजा चाखा. (३७)

وَلَقَدْ صَبَّحَهُم بُكْرَةً عَذَابٌ مُّسْتَقِرٌّ ﴿٣٨﴾

आणि विश्वसनीय गोष्ट आहे की, त्यांना फारच सकाळी, एक जागी पकडणाऱ्या निश्चित शिक्षेने गारद करून टाकले. [८] (३८)

فَذُوقُوا۟ عَذَابِى وَنُذُرِ ﴿٣٩﴾

(घ्या) आता माझी शिक्षा आणि माझ्या भिवविण्याची मजा चाखा. (३९)

وَلَقَدْ يَسَّرْنَا ٱلْقُرْءَانَ لِلذِّكْرِ فَهَلْ مِن مُّدَّكِرٍ ﴿٤٠﴾

नि:संशय आम्ही कुरआनाला समजण्याकरिता सोपे करून दिले आहे, [९] तर कोणी आहे कीं यापासून बोध घेईल? (४०)

وَلَقَدْ جَآءَ ءَالَ فِرْعَوْنَ ٱلنُّذُرُ ﴿٤١﴾

आणि फिरऔनच्या जवळ सुध्दा भिवविणारे आले. [१०] (४१)

१) म्हणजे असा वारा पाठविला जो त्यांना खडे मारित होता. म्हणजे त्यांच्या वस्त्यांना त्यांच्यावर उलटवून देण्यात आले अशा प्रकारे कीं त्यांच्या वरचा भाग खाली आणि खालचा भाग वर. याच्यानंतर त्यांच्या वर कठीण दगडांचा पाऊस पडला, जसे की सू.हूद वगैरे मध्ये तपशील येऊन चुकला.

२) आले लूत ने अभिप्रेत खुद्द ह. लूत عليه السلام आणि त्यांच्यावर ईमान आणणारे लोक आहेत. ज्यांच्यात ह.लूत عليه السلام ची पत्नी शामील नाही. कारण की ती ईमानवाली नव्हती. तथापि ह. लूत عليه السلام च्या दोन मुली त्यांच्या बरोबर होत्या. सहर ने अभिप्रेत रात्रीचा शेवटचा भाग आहे.

३) म्हणजे त्यांना शिक्षेतून वाचविणे, ही आमची दया आणि उपकार होता, जो त्यांच्यावर झाला.

४) म्हणजे शिक्षा येण्यापूर्वी, आमच्या सक्त पकडीपासून भिवविले होते.

५) परंतु त्यांनी याची पर्वा केली नाही; किंबहुना शंका घेतली आणि भिवविणाऱ्यांशी भांडण करीत राहिले.

६) लूत عليه السلام च्या पाहुण्यांना फुसलाविले किंवा त्यांच्याकडून मागितले. अर्थ हा आहे कीं, जेव्हा लूत عليه السلام च्या लोकांना समजले की काही सुंदर नवजवान लूत عليه السلام कडे आले आहेत. (जे मुळांत देवदूत होते आणि त्यांना शिक्षा देण्यासाठीच आले होते.) तेव्हा त्यांनी लूत عليه السلام कडे मागणी केली की या पाहुण्यांना आमच्या हवाली करून द्यावे, कारण कीं आम्ही आपल्या वाईट सवयीचे त्यांच्याकडून समाधान करून घ्यावे.

७) असे म्हणतात कीं हे देवदूत जिब्रईल, मिकाईल आणि इस्राफील होते. जेव्हा त्यांनी वाईट कृत्याच्या इराद्याने देवदुतांना (पाहुण्यांना) घेऊन जाण्यावर फारच आग्रह केला, तेव्हा जिब्रईलने आपल्या पंखाचा एक हिस्सा त्यांना मारला; ज्यामुळे त्यांच्या डोळ्यांची बुब्बुळेच बाहेर निघून आली. काही म्हणतात फक्त डोळ्यांची दृष्टी नाहीशी झाली तर सार्वत्रिक शिक्षेच्यापूर्वी ही खास शिक्षा त्यांना मिळाली. जे ह. लूत عليه السلام जवळ वाईट इराद्याने आले होते. आणि डोळ्यांच्या दृष्टीने वंचित् होऊन घरी पोहचले. आणि मग सकाळी, त्या सर्वात्रिक शिक्षेत बर्बाद होऊन गेलेत जी संपूर्ण लोकांसाठी आली. (तफसीर इब्ने कसीर)

८) म्हणजे सकाळी त्यांच्याजवळ ठरलेली शिक्षा येऊन पोहचली. मुस्तकर्र चा अर्थ त्यांच्यावर अवतीर्ण होणारी जी त्यांना गारद केल्याशिवाय सोडणार नाही.

९) तय्यसीर कुरआनाचा या अध्यायात वारंवार उल्लेख करण्याचा उद्देश्य हा आहे. कीं, हे कुरआन आणि त्याच्या समजण्याला व पाठ करण्याला सोपे करून द्यावे. हा अल्लाह्चा मोठाच उपकार आहे. त्याचे आभार मानण्याकडून माणसाने कधी गाफील होता कामा नये.

१०) नुजुर, नजीर चे अनेक वचन आहे म्हणजे भिवविणारा.

كَذَّبُوْا بِاٰيٰتِنَا كُلِّهَا فَاَخَذْنٰهُمْ اَخْذَ عَزِيْزٍ مُّقْتَدِرٍ (٤٢)

**त्यांनी आमच्या सर्व निशाण्यास खोटे म्हटले.[१] मग तेव्हा आम्ही त्यांना मोठ्या जबरदस्त शक्तीशाली पकडीत पकडून घेतले.[२] (४२)**

اَكُفَّارُكُمْ خَيْرٌ مِّنْ اُولٰٓئِكُمْ اَمْ لَكُمْ بَرَآءَةٌ فِى الزُّبُرِ (٤٣)

**(अहो कुरैशी लोकांनो)! काय तुमचे काफिर त्या काफिरांपेक्षा काही श्रेष्ठ आहेत?[३] किंवा तुमच्याकरिता पूर्वीच्या पुस्तकाध्ये माफी पत्र लिहले आहे?[४] (४३)**

اَمْ يَقُوْلُوْنَ نَحْنُ جَمِيْعٌ مُّنْتَصِرٌ (٤٤)

**अथवा हे म्हणतात की आम्ही वर्चस्व मिळविणारा समूह आहोत.[५] (४४)**

سَيُهْزَمُ الْجَمْعُ وَيُوَلُّوْنَ الدُّبُرَ (٤٥)

**लवकरच हा समूह हार खाईल आणि पाठ फिरवून पळू लागेल.[६] (४५)**

بَلِ السَّاعَةُ مَوْعِدُهُمْ وَالسَّاعَةُ اَدْهٰى وَاَمَرُّ (٤٦)

**किंबहुना कयामतची घटका त्यांच्या वायद्याचा वेळ आहे. आणि कयामत, मोठी आपत्ती आणि फारच कटु गोष्ट आहे.[७] (४६)**

اِنَّ الْمُجْرِمِيْنَ فِىْ ضَلٰلٍ وَّسُعُرٍ (٤٧)

**नि:संशय गुन्हेगार लोक बहकलेले आणि शिक्षेत आहेत. (४७)**

يَوْمَ يُسْحَبُوْنَ فِى النَّارِ عَلٰى وُجُوْهِهِمْ ؕ ذُوْقُوْا مَسَّ سَقَرَ (٤٨)

**ज्या दिवशी ते आपल्या तोंडावाटे अग्नीत फरफटत नेले जातील (आणि त्यांना सांगण्यात येईल) नरकाग्नीची आग लागण्याची मजा चाखा.[८] (४८)**

اِنَّا كُلَّ شَىْءٍ خَلَقْنٰهُ بِقَدَرٍ (٤٩)

**नि:संशय आम्ही प्रत्येक वस्तुला (निश्चित) अंदाजाप्रमाणे पैदा केले आहे.[९] (४९)**

१) त्या निशाण्या, ज्यांच्या मार्फत ह. मूसा ﷷ ने फिरऔन आणि त्याच्या लोकांना भिवविले. या नऊ (९) निशाण्या होत्या, ज्यांचा उल्लेख पूर्वी येऊन चुकला आहे.

२) म्हणजे त्यांना गारद करून टाकले, कारण त्या शिक्षा अशा सामर्थ्यवान अल्लाह्ची पकड होत्या, जो सूड उगविण्यास समर्थ होता. त्याच्या पकडी नंतर कोणी वाचू शकत नाही.

३) हा प्रश्नोद्‌गार नकारार्थी आहे. म्हणजे हे अरबवासियांनो! तुमचे काफिर, मागील काफिरांपेक्षा श्रेष्ठ नाहीत. जेव्हा त्यांना आपल्या कुफ्रमुळे गारद करून टाकण्यात आले. तर तुम्ही जेव्हा की यांच्यापेक्षा कनिष्ठ आहात शिक्षेपासून सुरक्षित रहाण्याची आशा का बाळगतात?

४) जुबुर ने अभिप्रेत मागील पैगंबरांवर अवतीर्ण झालेली पुस्तके आहेत. म्हणजे काय तुमच्या बाबतीत, अवतीर्ण झालेल्या पुस्तकांत सूट देण्यात आली आहे कीं, हे कुरैश किंवा अरब जे आपल्या मर्जीनुसार वागत राहतील, त्यांच्यावर शिक्षा येणार नाही.

५) संख्या बाहुल्य आणि साधन सामुग्रीच्या सामर्थ्यामुळे, कोणी आमच्यावर वरचढ होईल याची शक्यता नाही. किंवा आमचा मामला संघटीत आहे. आम्ही शत्रुवर सूड उगविण्यास समर्थ आहोत.

६) अल्लाह्ने त्यांच्या निरर्थक अहंकाराचे खंडन केले. समूहाने अभिप्रेत मक्केचे काफिर आहेत. म्हणूनच बद्रमध्ये त्यांचा पराभव झाला. आणि हे पाठ फिरवून पळाले. श्रीमंत मुशरिक आणि कुफ्रचे स्तंभ, गारद करून टाकण्यात आले. बद्रच्या युध्दाच्या प्रसंगी जेव्हा नबी ﷺ,फारच काकुळतीने आणि व्याकुळतेने आपल्या तंबुत प्रार्थना करण्यात व्यस्त होते. तेव्हा ह. अबुबकर सिद्दीकी ﵁ नी फर्मावले, ''बस करा! हे अल्लाह्चे रसूल!! आपण अल्लाह्च्या समोर फारच काकुळता आणि व्याकुळता व्यक्त केली.'' म्हणून आपण ﷺ तंबुच्या बाहेर आले तेव्हा आपल्या शुभ मुखात हेच महावाक्य होते. (अल्‌बुखारी)

७) अद्‌हा फारच फजीत करणारा, अमर्र, फारच कटु. म्हणजे जगात जे हे ठार केले गेले, कैदी बनविले गेले, वगैरे. ही त्यांची शेवटची शिक्षा नाही किंबहुना याच्यापेक्षासुध्दा जास्त कडक शिक्षा, त्यांना कयामतच्या दिवशी दिल्या जातील, ज्याचा यांच्याशी वायदा केला जात आहे.

८) सकर हे पण नरकाग्नीचे एक नाव आहे. म्हणजे याची गर्मी आणि कडक शिक्षांची मजा चाखा.

९) अईम्मा ए सुन्नत ने हे महावाक्य, आणि या सारख्या दुसऱ्या महावाक्यांनी आधार घेत, तकदीरे इलाहीला सिध्द केले आहे. ज्याचा अर्थ आहे कीं, अल्लाह्तआलाला सृष्टीला निर्माण करण्यापूर्वीच सर्वांचे ज्ञान होते. आणि त्याने सर्वांचे दैव लिहून दिले आहे. आणि कदरीय:पंथाचे खंडन केले, ज्याचा उदय सहाबांच्या ﵃ शेवटच्या काळात झाला (इब्ने कसीर)

وَمَآ اَمْرُنَآ اِلَّا وَاحِدَةٌ كَلَمْحٍۢ بِالْبَصَرِ ﴿٥٠﴾

आणि आमचा हुकूम, फक्त एक वेळेचा (एक शब्दच) असतो, जसे डोळ्याचे लावविणे. (५०)

وَلَقَدْ اَهْلَكْنَآ اَشْيَاعَكُمْ فَهَلْ مِنْ مُّدَّكِرٍ ﴿٥١﴾

आणि आम्ही तुमच्या सारख्या कित्येकांचा नाश करून चुकलो आहोत;[1] तर कोणी आहे बोध घेणारा? (५१)

وَكُلُّ شَيْءٍ فَعَلُوْهُ فِي الزُّبُرِ ﴿٥٢﴾

जी काही (कर्मे) त्यांनी केली आहेत, सर्व कर्मपत्रात लिहिलेली आहेत.[2] (५२)

وَكُلُّ صَغِيْرٍ وَّكَبِيْرٍ مُّسْتَطَرٌ ﴿٥٣﴾

(अशाच प्रकारे) प्रत्येक लहान मोठी गोष्ट पण लिहिलेली आहे.[3] (५३)

اِنَّ الْمُتَّقِيْنَ فِيْ جَنّٰتٍ وَّنَهَرٍ ﴿٥٤﴾

खचित्च आमचे भय बाळगणारे, स्वर्गीय बागात आणि नद्यात [4] (असतील) (५४)

فِيْ مَقْعَدِ صِدْقٍ عِنْدَ مَلِيْكٍ مُّقْتَدِرٍ ﴿٥٥﴾

सन्मानाच्या बैठकीत [5] परम समर्थ बादशहाच्या सानिध्यात [6] (असतील) (५५)

## (५५) सू. रहमान

महावाक्ये ७८ | रुकूअ ३

آيَاتُهَا ٧٨ (٥٥) سُوْرَةُ الرَّحْمٰنِ مَدَنِيَّةٌ (٩٧) رُكُوْعَاتُهَا ٣

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اَلرَّحْمٰنُ ﴿١﴾

परम दयाळू ने (१)

عَلَّمَ الْقُرْاٰنَ ﴿٢﴾

कुरआन शिकविले[7] (२)

१) म्हणजे मागील जनसमूहांचा काफिरांना, जे कुफ्र मध्यें तुमच्याच सारखे होते.

२) किंवा दुसरा अर्थ आहे, लोहे मुहफूज मध्ये लिहिलेले आहे.

३) म्हणजे जीव सृष्टीची सर्व कर्मे बोलणे आणि कामे लिहलेले आहेत लहान असोत वा मोठे क्षुलल्क असोत किंवा शानदार.

४) आणि वेगवेगळ्या आणि तऱ्हेतऱ्हेच्या बागात असतील. 'नहर' म्हणजे जे स्वर्गाच्या तमाम नद्यांना शामील करते.

५) मकअदि सिद्कीन सन्मानाची बैठक किंवा खरी सभा जिच्यात न पापाची गोष्ट होईल न निरर्थक गोष्टी अभिप्रेत स्वर्ग आहे.

६) मलियीकीन मुक्तदिर, सामर्थ्यवान बादशाह, म्हणजे तो प्रत्येक प्रकारच्या सामर्थ्यांना सपन्न आहे, जे इच्छील ते करू शकतो. कोणी त्याला हत्बल करू शकत नाही. 'इन्द' (जवळ) हा इशारा आहे त्या प्रतिष्ठित जागेचा आणि आदर सन्मानाचा जो ईमान वाल्यांना अल्लाह्जवळ प्राप्त होईल.

✲ याला काही लोकांनी मदनी ठरविले आहे. तथापि बरोबर हेच आहे की हा मक्की आहे. (फत्हुल कदीर) याचे समर्थन त्या हदीशीने सुध्दा झाले आहे. ज्यात नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले काय गोष्ट आहे. की तुम्ही खामोश राहता तुमच्याहून चांगले तर जिन्न आहे, की जेव्हा जिन्नवाल्या रात्रीला, हा अध्याय त्यांच्या समोर वाचला तर जेव्हा पण मी, ''फबि अय्यी आलाई रब्बिकुमा तुकज्जीबान'' पढत असे तर ते याच्या उत्तरात म्हणत, ''ला बिशय्अिन् मिन्निअमिका रब्बना नुकज्जिबु फलकल् हम्द.'' (तिर्मिझी तफसीर सू. रहमान)

७) असे म्हणतात कीं हे मक्केवाल्यांच्या उत्तरात आहे. जे म्हणत असत की कुरआन मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)ला कोणी मनुष्य शिकवितो. काही म्हणतात कीं यांच्या या म्हणण्याच्या उत्तरात आहे कीं, रहमान काय आहे? कुरआन शिकविण्याचा अर्थ आहे, त्याला सुलभ करून दिले. किंवा अल्लाह्ने आपल्या पैगंबराला शिकविले; आणि पैगंबराने आपल्या उम्मतीला शिकविले. या अध्यायात अल्लाह्ने आपल्या पुष्कळशा देणग्या मोजविल्या आहेत. कारण की कुरआनाची शिकवण यांच्यात आपल्या श्रेष्ठत्व आणि दर्ज्यांत आणि महत्त्व व फायदा पोहचविण्याच्या अनुषंगाने सर्वात ठळक आहे. म्हणून प्रथम या देणगीचा उल्लेख केला (फत्हुल कदीर)

خَلَقَ الْإِنسَانَ ۝٣
**त्यानेच मनुष्याला निर्माण केले.** [१] ३

عَلَّمَهُ الْبَيَانَ ۝٤
**त्याला बोलावयास शिकवले** [२] ४

الشَّمْسُ وَالْقَمَرُ بِحُسْبَانٍ ۝٥
**सूर्य आणि चंद्र (निश्चित केलेल्या) हिशेबाने आहेत.** [३] ५

وَالنَّجْمُ وَالشَّجَرُ يَسْجُدَانِ ۝٦
**आणि नक्षत्र आणि वृक्ष उभयता सजदा करीत आहेत.** [४] ६

وَالسَّمَاءَ رَفَعَهَا وَوَضَعَ الْمِيزَانَ ۝٧
**त्यानेच आकाशाला उंच उभारले आणि त्यानेच तराजू स्थापली** [५] ७

أَلَّا تَطْغَوْا فِي الْمِيزَانِ ۝٨
**यासाठी की तोलण्यात तुम्ही कमी जास्त करू नये** [६] ८

وَأَقِيمُوا الْوَزْنَ بِالْقِسْطِ وَلَا تُخْسِرُوا الْمِيزَانَ ۝٩
**न्यायाने ठीक तोल तोला, आणि तोलण्यात कमी तोलू नका** ९

وَالْأَرْضَ وَضَعَهَا لِلْأَنَامِ ۝١٠
**आणि त्यानेच जीव सृष्टीसाठी जमीन अंथरून दिली.** १०

فِيهَا فَاكِهَةٌ وَالنَّخْلُ ذَاتُ الْأَكْمَامِ ۝١١
**जिच्यात फळफळावळ आहेत आणि घडवाल्या खजुरींचे वृक्ष आहेत** [७] ११

وَالْحَبُّ ذُو الْعَصْفِ وَالرَّيْحَانُ ۝١٢
**आणि भूस वाले धान्य आहे,** [८] **आणि सुवासिक फुले आहेत.** १२

فَبِأَيِّ آلَاءِ رَبِّكُمَا تُكَذِّبَانِ ۝١٣
**तर (हे जिन्न आणि मनुष्यांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यांना खोटे ठरवाल?** [९] १३

خَلَقَ الْإِنسَانَ مِن صَلْصَالٍ كَالْفَخَّارِ ۝١٤
**त्याने मनुष्याला खण खण वाजणाऱ्या माती पासून निमार्ण केले, जी ठिकरी सारखी होती.** [१०] १४

१) म्हणजे हे माकड वगैरे जनावरांपासून विकसीत होत होत, मनुष्य होऊन गेले नाहीत, जसे की डार्विनचा उत्क्रांतीचा सिद्धांत आहे. किंबहुना मनुष्याला याच चेहरा आणि स्वरूपात अल्लाहने स्वत: निर्माण केले आहे. जी जनावरांपेक्षा वेगळी एक मजबुत (जीव) सृष्टी आहे. मनुष्याचा शब्द एक जात म्हणून आहे.

२) या वर्णनाने अभिप्रेत प्रत्येक मनुष्याची आपली मातृभाषा आहे; जी शिकल्या शिवाय स्वत:च प्रत्येक मनुष्य बोलून घेतो. आणि इच्यात आपल्या मनातील विचार जाहीर करतो. येथ पावेतो की ते लहान मूल पण बोलते ज्याला कुठल्या गोष्टीचे ज्ञान आणि समज नसते हा त्या अल्लाह्च्या शिकवणीचा परिणाम आहे, ज्याचा उल्लेख या महावाक्यात आहे.

३) म्हणजे अल्लाह्च्या ठरविलेल्या अंदाजाप्रमाणे आपआपल्या कक्षेत चालतात रहातात. याच्या पलीकडे जात नाही.

४) जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''की अल्लाह्च्या समोर सर्व सजद्यात आहेत आकाशवाले आणि सर्व जमीनवाले, आणि सूर्य आणि चंद्र आणि तारे, आणि पर्वत आणि वृक्ष आणि जनावरे,......हे महावाक्य (सू.अल्हज्ज- १८)

५) म्हणजे पृथ्वीत न्याय ठेवला, ज्याचा त्याने लोकांना हुकूम दिला. जसे फर्माविले, ''खचित्च आम्ही आपल्या पैगंबरांना स्पष्ट प्रमाणे देऊन पाठविले. आणि त्यांच्या बरोबर पुस्तक आणि न्याय अवतरीत केला. कारण की लोकांनी न्यायावर कायम रहावे.'' (सू.अल्हदीद- २५)

६) म्हणजे न्यायाच्या मर्यादेबाहेर जाऊं नका

७) अक्माम, किम्चे अनेक वचन आहे. खजुरीवर चढलेले वेष्टण.

८) 'हब्ब' (दाणा) ने अभिप्रेत, प्रत्येक ते खाद्यांन आहे, जे माणसे आणि जनावरे खातात. वाळून याचे रोपटे भुसा बनून जाते. जे जनावरांच्या उपयोगात येते.

९) हे मनुष्य आणि जिन्न उभयतांना संबोधन आहे. अल्लाहृतआला आपल्या देणग्या मोजवून, त्यांना विचारित आहे. ही तक्रार त्या माणसासारखी आहे, जो कोणावर सतत उपकार करीत राहील, परंतु तो याच्या उपकाराशी कृतघ्नता करील. जसे म्हणावे, मी तुझे अमुक काम केले; काय तू त्याला नाकारतोस? अमुक वस्तू तुला दिली; काय तुला आठवत नाही? तुझ्यावर अमुक उपकार केला? काय तुला आमची जरा पण कल्पना नाही?

१०) 'सलसाल', कोरडी माती, जिच्यात आवाज असावा. फख्खार, आगीत भाजलेली माती, जिला ठिकरी म्हणतात. या मनुष्याने अभिप्रेत ह. आदम عليه السلام आहेत. ज्यांचा प्रथम मातीने पुतळा बनविला गेला. मग त्यांच्यात अल्लाहने प्राण फुंकले मग ह. आदम عليه السلام च्या डाव्या पासळीपासून, हव्वाला निर्माण केले. मग त्या दोघांपासून मनुष्याचा वंश चालला.

وَخَلَقَ الْجَآنَّ مِنْ مَّارِجٍ مِّنْ نَّارٍ ﴿١٥﴾
**आणि जिन्नातास अग्नीच्या ज्वालेपासून निर्माण केले.**[१] ⑮

فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿١٦﴾
**तर (हे जिन्न आणि मनुष्यांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यास खोटे ठरवाल?**[२] ⑯

رَبُّ الْمَشْرِقَيْنِ وَرَبُّ الْمَغْرِبَيْنِ ﴿١٧﴾
**तो पालनकर्ता आहे दोन्ही पूर्वेचा आणि दोन्ही पश्चिमेचा**[३] ⑰

فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿١٨﴾
**तर (हे जिन्न आणि मनुष्यांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यास खोटे ठरवाल ?** ⑱

مَرَجَ الْبَحْرَيْنِ يَلْتَقِيٰنِ ﴿١٩﴾
**त्याने दोन समुद्र सोडले की ते आपसात मिळतात.** ⑲

بَيْنَهُمَا بَرْزَخٌ لَّا يَبْغِيٰنِ ﴿٢٠﴾
**या दोघांमध्ये एक अडकण आहे कीं याच्यापुढे जाऊ शकत नाही**[४] ⑳

فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٢١﴾
**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ?** ㉑

يَخْرُجُ مِنْهُمَا اللُّؤْلُؤُ وَالْمَرْجَانُ ﴿٢٢﴾
**या दोन्हीही मधून मोती आणि प्रवाळ निघतात.**[५] ㉒

१) याच्याने अभिप्रेत सर्वांत पहिला जिन्न आहे जो जिन्नांचा पितामह आहे. किंवा जिन्न एक जात म्हणून आहे. जसे की भाषांतर जातीच्या अनुषंगाने केले गेले आहे. 'मारिज,' आगीने उंच होणाऱ्या ज्वालेला म्हणतात.
२) म्हणजे तुमची ही निर्मिती सुध्दा आणि मग तुमच्या पासून आणखी वंशाची निर्मिती आणि संवर्धन, हे अल्लाह्च्या देणग्यांमधून आहे. काय तुम्ही या देणगीला नाकाराल?
३) एक उन्हाळ्यातील पूर्व, आणि एक हिवाळ्यातील पूर्व. अशाचप्रकारे पश्चिम आहे. म्हणून दोघांचा दुप्पट उल्लेख केला आहे. ऋतुंच्या अनुषंगाने पूर्व आणि पश्चिमेचे वेगळे होणे, याच्यांत सुध्दा मनुष्य आणि जिन्नांची बरीच प्रयोजने आहेत. म्हणून याला सुध्दा देणगी ठरवून दिले गेले आहे.
४) 'मरज' म्हणजे वाहवून दिले. याचा तपशील सू. फुर्कान आ. ५३ मध्ये येऊन चुकला. ज्याचा खुलासा हा आहे कीं, दोन समुद्राने अभिप्रेत काहींच्या जवळ, त्यांचे वेगवेगळे अस्तित्व आहे. जसे गोडपाण्याच्या नद्या आहेत. ज्याच्याने शेतींना पाणी पाजले जाते. आणि मनुष्य त्यांचे पाणी आपल्या दुसऱ्या गरजांमध्ये सुद्धा वापरात आणतो. दुसरा प्रकार समुद्राचे पाणी आहे. जे खारे आहे. ज्याचे आणखी काही फायदे आहेत. हे दोघे आपसात मिळत नाही. काहींनी याचा भावार्थ हा सांगितला आहे, की खाऱ्या समुद्रामध्येच गोड्या पाण्याच्या लाटा चालतात; आणि या दोन्ही लाटा आपसात मिसळत नाहीत. किंबहुना एक दुसऱ्यापासून वेगळ्या आणि ठळकच राहतात. याचा एक प्रकार तर हा आहे की, अल्लाह्तआलाने खाऱ्या सुमद्रातच, कित्येक ठिकाणी गोड्या पाण्याच्या लहरी पण चालू करून दिल्या आहेत. आणि त्या खाऱ्यापाण्यापासून वेगळ्याच राहतात. दुसरे स्वरूप हे पण आहे कीं, वरती खारे पाणी असावे आणि त्याच्या तळात खाली, गोड्या पाण्याचा झरा,. जसे की खरोखर काही ठिकाणांवर असे आहे. तिसरे स्वरूप असे आहे कीं, ज्या ठिकाणांवर गोडे पाण्याच्या नद्यांचे पाणी, समुद्रात जाउन मिळते, तेथे कित्येक लोकांचा प्रत्यक्ष अनुभव आहे की, दोन्ही पाणी मैलो गणती, अशा प्रकारे बरोबर बरोबर चालतात. की एका बाजूला नदीचे पाणी आणि दुसऱ्या बाजूला विशाल समुद्राचे खारे पाणी त्यांच्या दर्म्यान जरी काही आड नाही. परंतु ते आपसात मिळत नाही. दोहोंच्या दर्म्यान हे ते अडकण आहे, जे अल्लाह्ने ठेवून दिले आहे. दोन्ही याला ओलांडित नाहीत.
५) ''मर्जान ने लहान मोती किंवा मुंगे अभिप्रेत आहेत. असे म्हणतात कीं आकाशातून पाऊस पडतो. तेव्हा शिंपले आपले तोंड उघडून देतात, जो थेंब त्यांच्यात पडून जातो, तो मोती बनून जातो. प्रसिध्द असेच आहे मोती वगैरे गोड्या पाण्याच्या नद्यांमधून नाही, किंबहुना खाऱ्या पाण्याच्या समुद्रातूनच निघतात. परंतु कुरआनाने दोहोंचे जमीर उपयोगात आणले आहे. ज्याने ठाऊक होते की दोहोंपासून मोत्ये निघतात. कारण की मोती भरपूर प्रमाणात समुद्रातूनच निघतात; म्हणून त्याची प्रसिध्दी होऊन गेली आहे. तथापि गोड्या नद्यामधून ते निघत नाही, असे म्हणणे शक्य नाही. किंबहुना सध्याच्या काळातल्या अनुभवांनी सिध्द झाले आहे की गोड्या नदयांमध्ये सुध्दा मोत्ये असतात. तथापि त्यांच्या सतत वाहण्यामुळे त्यांच्यातून मोती काढणे कठीण काम आहे. काहींनी म्हटले आहे कीं, अभिप्रेत, सागर आणि नद्या दोन्ही एकत्रित आहेत, यांच्यातून कोण्या एकातून पण मोती निघून जाईल, तर त्यांच्यावर दुहेरी शब्द लागू करणे बरोबर आहे. काहींनी म्हटले कीं गोड्या नद्या पण सर्वसाधारण पणे समुद्रातच पडतात, आणि तेथूनच मोती काढण्यात येतात. म्हणून जणू पाणी निघण्याची जागा खारे समुद्रच झाले. परंतु दुसऱ्या नद्यांचा वाटा पण याच्यात शामील आहे. परंतु चालू काळातील प्रयोगानंतर या खुलासा आणि स्पष्टीकरणाची जरूरी नाही. वल्लाह् अअ्लम!

| | |
|---|---|
| فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۝٢٣ | **तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल[१] ㉓** |
| وَلَهُ الْجَوَارِ الْمُنْشَئٰتُ فِى الْبَحْرِ كَالْاَعْلٰمِ ۝٢٤ | **आणि अल्लाह्‌चेच आहेत ती जहाजे, जो समुद्रात पर्वता सारखे उभे (चालत फिरत) आहेत.[२] ㉔** |
| فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۝٢٥ | **(तर हे जिन्न आणि मनुष्यांनो !) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल?[३] ㉕** |
| كُلُّ مَنْ عَلَيْهَا فَانٍ ۝٢٦ | **भूतळावर जे आहे, सर्व नाश होणारे आहे. ㉖** |
| وَّيَبْقٰى وَجْهُ رَبِّكَ ذُو الْجَلٰلِ وَ الْاِكْرَامِ ۝٢٧ | **फक्त तुझ्या पालनकर्त्याचे व्यक्तीत्व, जे प्रतापशाली आणि महनीय आहे, बाकी राहून जाईल. ㉗** |
| فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۝٢٨ | **तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल?[४] ㉘** |
| يَسْـَٔلُهٗ مَنْ فِى السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ؕ كُلَّ يَوْمٍ هُوَ فِىْ شَاْنٍ ۝٢٩ | **सर्व आकाश आणि पृथ्वीवाले त्याच्याच जवळ मागतात;[५] दररोज तो एकान एका शानमध्ये असतो.[६] ㉙** |
| فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۝٣٠ | **तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल?[७] ㉚** |
| سَنَفْرُغُ لَكُمْ اَيُّهَ الثَّقَلٰنِ ۝٣١ | **(हे जिन्न आणि मनुष्यांनो !) लवकरच आम्ही सर्वांकडून मोकळे होऊन तुम्हाकडे लक्ष देऊ.[८] ㉛** |
| فَبِاَيِّ اٰلَاۤءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۝٣٢ | **तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल? ㉜** |

१) हे जवाहिर आणि मोत्ये, हे शोभा व शृंगार आणि रूप सौंदर्याचे दर्शक आहेत. आणि शौकीन व धनिक लोक, त्यांना आपल्या सौंदर्याच्या समाधानासाठी आणि रूप सौंदर्यात वृध्दी व्हावी म्हणूनच उपयोगात आणतात. म्हणून त्यांचे देणगी होणे पण स्पष्ट आहे.

२) अल्‌जवार, जारिया, ( चालणारी) चे अनेक वचन आहे. मुनशआत चा अर्थ मरफुआत आहे, म्हणजे उंच उभारलेली अभिप्रेत शिडे आहेत जे वाऱ्यावर चालणाऱ्या नावावर झेंड्याप्रमाणे उंच बनविले जातात. काहींनी याचा अर्थ मसनुआत केला आहे. म्हणजे अल्लाह्‌ने बनविलेली जी समुद्रात चालतात.

३) यांच्या मार्फत सुध्दा वाहतुक आणि ओझी वाहण्यात जी सुलभता आहे. तिचे स्पष्टीकरण करण्याची आवश्यकता नाही. म्हणून ही सुध्दा अल्लाह्‌ची मोठी देणगी आहे.

४) जगाच्या नष्ट झाल्यानंतर, बदला आणि शिक्षा म्हणजे न्यायाची व्यवस्था होईल म्हणून ही सुध्दा एक मोठी देणगी आहे. ज्यावर अल्लाह्‌चे आभार मानणे आवश्यक आहे.

५) म्हणजे सर्व त्याचे गरजवंत आणि त्याच्या दरवाजा समोरील याचक आहेत.

६) दररोजचा अर्थ नेहमी, शाउन्‌चा अर्थ काम किंवा मामला, म्हणजे दररोज तो कोण्या न कोण्या कामांत व्यस्त आहे. कोणाला आजारी पाडत आहे, कोणाला तंदुरूस्ती, कोणाला श्रीमंत बनवित आहे, तर कोण्या श्रीमंताला फकीर, कोणाला फकीरीतून बादशहा, आणि कोणाला बादशहातून फकीर, कोणाला उच्च आसनी आरूढ करीतो, कोणाला गर्तेत ढकलत आहे. कोणाला आहे पासून नाही, कोणाला नाही पासून आहे करीत आहे. अलबत्ता विश्वामध्ये हे सारे बदल, त्याच्याच हुकूम आणि मर्जीने होत आहेत. आणि रात्र दिवसाचा कोणी क्षण असा नाही जो त्याच्या कार्य करण्याने खाली असावा. हुवल हय्युम कय्युम, लाता खुजुहु सिनतुन्‌वला नौम'

७) आणि एवढ्या मोठ्या व्यक्तीत्वाचा नेहमी सेवकांच्या कामात आणि मामल्यात व्यवस्थेत लागून रहाणे, किती मोठी देणगी आहे.

८) याचा हा अर्थ नाही कीं, अल्लाह्‌ला फुरसत नाही, किंबहुना हे एक बातचित म्हणून बोलले गेले. ज्याचा उद्देश्य शिक्षेपासून भिवविणे आणि धमकी आहे.

يٰمَعْشَرَ الْجِنِّ وَ الْاِنْسِ اِنِ اسْتَطَعْتُمْ اَنْ تَنْفُذُوْا مِنْ اَقْطَارِ السَّمٰوٰتِ وَ الْاَرْضِ فَانْفُذُوْا لَا تَنْفُذُوْنَ اِلَّا بِسُلْطٰنٍ ﴿٣٣﴾

हे जिन्न आणि मनुष्यांच्या समुदायांनो! जर तुमच्यात आकाश आणि पृथ्वीच्या हद्दीतून बाहेर निघून जाण्याची शक्ती आहे, तर निघून पळा![1] जोर आणि शक्ती शिवाय तुम्ही निघू शकत नाही.[2] (३३)

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٣٤﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल? (३४)

يُرْسَلُ عَلَيْكُمَا شُوَاظٌ مِّنْ نَّارٍ ۙ۬ وَّ نُحَاسٌ فَلَا تَنْتَصِرٰنِ ﴿٣٥﴾

तुमच्यावर आगीच्या ज्वाला आणि धूर सोडण्यात येईल,[3] मग तुम्ही सामना करूंशकणार नाही.[4] (३५)

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٣٦﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल? (३६)

فَاِذَا انْشَقَّتِ السَّمَآءُ فَكَانَتْ وَرْدَةً كَالدِّهَانِ ﴿٣٧﴾

मग जेव्हा आकाश फाटून लाल होऊन जाईल, जसे की लाल चामडे.[5] (३७)

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٣٨﴾

(तर हे जिन्न व मनुष्य हो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल (३८)

فَيَوْمَئِذٍ لَّا يُسْـَٔلُ عَنْ ذَنْۢبِهٖٓ اِنْسٌ وَّ لَا جَآنٌّ ﴿٣٩﴾

या दिवशी कोण्या मनुष्याला आणि कोण्या जिन्नाला त्याच्या पापाची विचारपूस केली जाणार नाही[6] (३९)

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٤٠﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल? (४०)

يُعْرَفُ الْمُجْرِمُوْنَ بِسِيْمٰهُمْ فَيُؤْخَذُ بِالنَّوَاصِيْ وَ الْاَقْدَامِ ﴿٤١﴾

पापी फक्त चेहऱ्यावरूनच ओळखून घेतले जातील.[7] आणि त्यांच्या डोक्याचे केस, आणि पाय धरून घेतले जातील[8] (४१)

१) हे धमकावणे पण, एक देणगी आहे. की कुकृत्य करणाऱ्याने कुकृत्य करण्यापासून माघार घ्यावी आणि सदाचरणी माणसाने जास्त पुण्य कमवावे.

२) म्हणजे अल्लाहची इच्छा आणि त्याच्या हुकूमापासून तुम्ही पळून कोठे जाऊ शकता तर जा! परंतु ही शक्ती कोणात आहे? आणि पळून शेवटी जाणार कोठे? कोणती जागा अशी आहे? जी अल्लाहच्या अखत्याराच्या बाहेर असेल, हे पण भिवविणे आहे. जे चर्चित भिवविण्याप्रमाणे एक देणगी आहे काहींनी म्हटले आहे की, हे हशरच्या मैदानात सांगण्यात येईल, जेव्हा की देवदुतांनी सर्व बाजूंनी लोकांना घेरून ठेवले असेल दोन्हीही भावार्थ आपल्या आपल्या जागी बरोबर आहेत.

३) अर्थ हा आहे की जर तुम्ही कयामतच्या दिवशी कोठे पळून सुध्दा गेले तर देवदूत आगीच्या ज्वाला आणि धूर तुमच्यावर सोडून,किंवा वितळलेले तांबे तुमच्या डोक्यावर टाकून तुम्हास परत घेऊन येतील, ‘नुहासून’ चा दुसरा अर्थ वितळलेल्या तांब्याचा केला गेला आहे.

४) म्हणजे अल्लाहच्या शिक्षेला टाळण्याचे तुमच्यात सामर्थ्य असणार नाहीं.

५) कयामतच्या दिवशी आकाश फाटून पडेल, देवदूत जमिनीवर उतरून येतील, त्या दिवशी हे नरकाग्नीच्या तीव्र उष्णतेने पिघळून लाल मेंढीच्या चामड्यासारखे होऊन जाईल. ‘दिहान’ म्हणजे लाल चामडे

६) म्हणजे ज्यावेळी ते थडग्यातून बाहेर निघतील नाहीतर नंतर हिशेबाच्या जागी त्यांच्याशी विचारपुस केली जाईल. काहींनी याचा हा अर्थ सांगितला आहे की गुन्हयाबद्दल विचारले जाणार नाही, कारण कीं यांचा तर संपूर्ण रेकार्ड देवदुतांजवळ सुध्दांअसेल आणि अल्लाहच्या ज्ञानात सुध्दा तथापि विचारले जाईल की तुम्ही हे का केले? किंवा हा अर्थ आहे, त्यांना विचारले जाणार नाही; किंबहुना मनुष्याचे अवयव, स्वत: बोलून प्रत्येक गोष्ट सांगतील.

७) म्हणजे ज्या प्रमाणे ईमानवाल्यांची निशाणी असेल कीं, त्यांचे वजूचे अवयव चमकत असतील अशाच प्रकारे गुन्हेगारांचे चेहरे काळे, डोळे निळे आणि ते भयभित असतील.

८) देवदूत त्यांची कपाळे त्यांच्या पायांबरोबर मिळवून धरतील आणि नरकाग्नीत टाकून देतील किंवा कधी कपाळांनी तर कधी पायांनी त्यांना धरतील.

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٤٢﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल? ४२

هٰذِهٖ جَهَنَّمُ الَّتِیْ یُكَذِّبُ بِهَا الْمُجْرِمُوْنَ ﴿٤٣﴾

हा आहे तो नरकाग्नी ज्याला पापी लोक खोटे समजत होते. ४३

یَطُوْفُوْنَ بَیْنَهَا وَبَیْنَ حَمِیْمٍ اٰنٍ ﴿٤٤﴾

त्याच्यात आणि उकळत्या गरम पाण्यात ते फेऱ्या घालीत असतील[१] ४४

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٤٥﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? ४५

وَلِمَنْ خَافَ مَقَامَ رَبِّهٖ جَنَّتٰنِ ﴿٤٦﴾

आणि त्या माणसाकरिता जो आपल्या पालनकर्त्यापुढे उभे राहण्यास भ्याला (त्याला) दोन दोन बागा आहेत.[२] ४६

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٤٧﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल ? ४७

ذَوَاتَاۤ اَفْنَانٍ ﴿٤٨﴾

(दोन्ही बागा) पुष्कळच फांद्या आणि शाखावाल्या आहेत.[३] ४८

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٤٩﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल ? ४९

فِیْهِمَا عَیْنٰنِ تَجْرِیٰنِ ﴿٥٠﴾

या दोन्ही (बागांत) दोन झरे वाहत आहेत.[४] ५०

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٥١﴾

(तर हे जिन्न व मनुष्यहो !) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल ? ५१

فِیْهِمَا مِنْ كُلِّ فَاكِهَةٍ زَوْجٰنِ ﴿٥٢﴾

या दोन्ही बागात प्रत्येक प्रकारच्या फळांच्या जोड्या असतील.[५] ५२

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٥٣﴾

तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? ५३

مُتَّكِـٕیْنَ عَلٰى فُرُشٍۭ بَطَآىِٕنُهَا مِنْ اِسْتَبْرَقٍ ؕ وَجَنَا الْجَنَّتَیْنِ دَانٍ ﴿٥٤﴾

स्वर्गवासी अशा बिछाइतीवर तक्के लावून बसलेले असतील, ज्यांची अस्तरे मुलायम रेशमाची असतील[६] आणि त्या दोन्ही बागांची फळे फारच जवळ असतील[७] ५४

१) म्हणजे कधी त्यांना उकळत्या गरम पाण्याची शिक्षा दिली जाईल आणि कधी उकळते पाणी पिण्याची शिक्षा 'आनिन' गरम म्हणजे खूप उकळणारे उष्ण पाणी; जे त्यांच्या आतड्यांना कापून टाकेल अअ्जनल्लाहु मिनहा!

२) जसे हदीस मध्ये येते, ''दोन बागा चांदीच्या आहेत, ज्यात भांडी आणि जे काही त्यांच्यात आहे सर्व चांदीचे असेल. दोन बागा सोन्याच्या आहेत. आणि त्यांची भांडी आणि जे काही त्यांच्यात आहे, सर्व सोन्याचेच असेल. (स. बुखारी तफसीर सू. रहमान) काही सहाबांच्या म्हणण्यात (आसार) आहे कीं सोन्याचे बाग विशेष ईमानवाले सानिध्य प्राप्त लोक, आणि चांदीचे बाग सर्वसाधारण ईमानवाले (अस्हाबुल यमीन) च्या करिता असतील. (इब्ने कसीर)

३) हा इशारा आहे याकडे कीं, याच्यात सावली घनदाट असेल तसेच फळफळावळांचे वैपुल्य असेल. कारण म्हणतात, की, प्रत्येक शाखा आणि फांद्दी फळांनी वाकलेली असेल. (इब्ने कसीर)

४) एकाचे नाव 'तसनीम' आणि दुसऱ्याचे 'सल्सबील' आहे.

५) म्हणजे स्वाद आणि चवीच्या अनुषंगाने प्रत्येक फळ दोन प्रकारचे असेल. हा आणखी खास कृपेचा एक प्रकार आहे. काहींनी म्हटले कीं, एक प्रकार सुक्या मेव्याचा आणि दुसरा ताज्या फळांचा असेल.

६) 'आबरी' म्हणजे वरचे कापड नेहमी अस्तरापेक्षा उत्तम आणि सुंदर असते; येथे फक्त अस्तराचे वर्णन आहे; ज्याचा अर्थ हा आहे कीं, वरचे कापड (आबरी) यापेक्षा कितीतरी जास्त उत्कृष्ट असेल.

७) इतक्याजवळ असतील कीं, बसल्या बसल्या किंवा निजल्या निजल्या सुध्दा तोडू शकतील. ''ज्यांची फळे वाकून पडली असतील.'' (सू.हाक्का- २३)

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٥٥﴾

**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? (५५)**

فِيْهِنَّ قٰصِرٰتُ الطَّرْفِ ۙ لَمْ يَطْمِثْهُنَّ اِنْسٌ قَبْلَهُمْ وَلَا جَآنٌّ ۚ﴿٥٦﴾

**तेथे (लाजवंती) खाली नजरावाल्या अप्सरा आहेत.[१] ज्यांना याच्यापूर्वी कोणी जिन्न आणि मनुष्याने हात लावला नाही.[२] (५६)**

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۚ﴿٥٧﴾

**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? (५७)**

كَاَنَّهُنَّ الْيَاقُوْتُ وَالْمَرْجَانُ ۚ﴿٥٨﴾

**त्या अप्सरा जणू माणिक आणि प्रवाळाच्या असतील.[३] (५८)**

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٥٩﴾

**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? (५९)**

هَلْ جَزَآءُ الْاِحْسَانِ اِلَّا الْاِحْسَانُ ۚ﴿٦٠﴾

**सुकृत्ये करणारांचा बदला उपकारा शिवाय काय आहे?[४] (६०)**

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ﴿٦١﴾

**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? (६१)**

وَمِنْ دُوْنِهِمَا جَنَّتٰنِ ۚ﴿٦٢﴾

**आणि यांच्या शिवाय दोन बागा आणखी आहेत.[५] (६२)**

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۙ﴿٦٣﴾

**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? (६३)**

مُدْهَآمَّتٰنِ ۚ﴿٦٤﴾

**ज्या दोन्ही दाट हिरव्यागार असतील.[६] (६४)**

فَبِاَيِّ اٰلَآءِ رَبِّكُمَا تُكَذِّبٰنِ ۚ﴿٦٥﴾

**तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यास खोटे ठरवाल ? (६५)**

فِيْهِمَا عَيْنٰنِ نَضَّاخَتٰنِ ۚ﴿٦٦﴾

**यांच्यात दोन (जोराने) भळभळणारे झरे आहेत.[७] (६६)**

१) ज्यांच्या नजरा आपल्या पती शिवाय कोणावर पडणार नाही आणि त्यांना आपले पतीच सर्वांत जास्त सुंदर आणि चांगले वाटतील.

२) म्हणजे कुंवारी आणि नवी नवेली असेल. याच्यापूर्वी ती कोणाच्या लग्न बंधनात राहीली नसेल. हे महावाक्य आणि याच्यापूर्वीची काही महावाक्ये यांच्याने स्पष्टरित्या माहित पडते कीं जे जिन्न ईमानवाले असतील ते पण ईमानवाल्या माणसांप्रमाणे स्वर्गांत जातील आणि त्यांच्यासाठी तेच काही असेल जे दुसऱ्या ईमानवाल्यांसाठी असेल.

३) म्हणजे स्वच्छतेत प्रवाळासारखी, आणि धवलतेत आणि लालीम्यांत मोती किंवा प्रवाळासारखे असतील ज्याप्रमाणे सही हदीशीमध्ये सुध्दा त्यांच्या रूप सौंदर्याला या शब्दांत वर्णन करण्यात आले आहे, ''त्यांच्या रूप सौंदर्यामुळे त्यांच्या पोटरीतील आतील भाग, मांस आणि हाडाच्या बाहेरून दिसेल.'' (स.बुखारी) एका दुसऱ्या रिवायतीत फर्माविले कीं, ''स्वर्गवाश्यांच्या पत्न्या इतक्या रूपवान आणि सौंदर्यवान असतील की जर त्यांच्यातून एखादी स्त्री जमिनीकडे डोकावून पाहील, तर आकाश आणि पृथ्वीच्या दरम्यानचा सर्व भाग प्रकाशित होऊन जाईल आणि सुंगधाने भरून जाईल. आणि तिच्या डोक्यावरची ओढणी इतकी बहुमूल्य असेल की, ती हे जग, आणि जे काही याच्यात आहे याहून उत्तम असेल.'' (स.बुखारी)

४) पहिल्या उपकाराने अभिप्रेत पुण्य आणि अल्लाहचे आज्ञापालन, आणि दुसऱ्या उपकाराने त्याचा मोबदला, म्हणजे स्वर्ग आणि त्याच्या देणग्या आहेत.

५) 'दुनिहिमा' ने प्रमाणे सुध्दा केले गेले आहे कीं, या दोन बागा शान आणि श्रेष्ठत्वात, मागच्या दोन बागांपेक्षा ज्यांचा उल्लेख आ. ६४ मध्ये येऊन चुकला कनिष्ठ असतील.

६) अधिक सुपिकते मुळे, आणि हिरव्यागार वनस्पतींच्या विपुलते मुळे काळसरपणाची त्यावर छटा असेल.

७) हे वैशिष्टय 'तजरियान' पासून हलके आहे.

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّکُمَا تُکَذِّبٰنِ ﴿٦٧﴾
तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल? (६७)

فِیۡهِمَا فَاکِهَةٌ وَّ نَخۡلٌ وَّ رُمَّانٌ ﴿٦٨﴾
या दोहोत फळे आणि खजुर आणि डाळिंबे असतील[१] (६८)

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّکُمَا تُکَذِّبٰنِ ﴿٦٩﴾
तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल? (६९)

فِیۡهِنَّ خَیۡرٰتٌ حِسَانٌ ﴿٧٠﴾
याच्यात चांगल्या चारित्र्याच्या सुंदर स्त्रिया आहेत.[२] (७०)

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّکُمَا تُکَذِّبٰنِ ﴿٧١﴾
तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोण कोणत्या देणग्यास खोटे ठरवाल? (७१)

حُوۡرٌ مَّقۡصُوۡرٰتٌ فِی الۡخِیَامِ ﴿٧٢﴾
(गोऱ्या रंगाच्या) अप्सरा स्वर्गात तंबुत बंद आहेत.[३] (७२)

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّکُمَا تُکَذِّبٰنِ ﴿٧٣﴾
(तर हे जिन्न व मनुष्य हो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यास खोटे ठरवाल? (७३)

لَمۡ یَطۡمِثۡهُنَّ اِنۡسٌ قَبۡلَهُمۡ وَ لَا جَآنٌّ ﴿٧٤﴾
या अप्सरांशी कोणी मनुष्य किंवा जिन्न याच्यापूर्वी भेटला नाही. (७४)

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّکُمَا تُکَذِّبٰنِ ﴿٧٥﴾
तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल? (७५)

مُتَّکِـِٕیۡنَ عَلٰی رَفۡرَفٍ خُضۡرٍ وَّ عَبۡقَرِیٍّ حِسَانٍ ﴿٧٦﴾
हिरव्या लोडावर आणि सुंदर बिछायतीवर टेके लाऊन (बसलेले) असतील[४] (७६)

فَبِاَیِّ اٰلَآءِ رَبِّکُمَا تُکَذِّبٰنِ ﴿٧٧﴾
तर तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल?[५] (७७)

تَبٰرَکَ اسۡمُ رَبِّکَ ذِی الۡجَلٰلِ وَ الۡاِکۡرَامِ ﴿٧٨﴾
तुझ्या पालनकर्त्याचे नाव फारच शुभकारक[६] आहे जो प्रतापशाली आणि परोपकारशील आहे. (७८)

## (५६) सू. वाकेअ:

महावाक्ये ९६ | रुकुअ ३

سُوۡرَةُ الۡوَاقِعَةِ مَکِّیَّةٌ (٥٦) (٤٦) — اٰیَاتُهَا ٩٦ — رُکُوۡعَاتُهَا ٣

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِیۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِذَا وَقَعَتِ الۡوَاقِعَةُ ﴿١﴾
जेव्हा कयामत घडून येईल.[७] (१)

لَیۡسَ لِوَقۡعَتِهَا کَاذِبَةٌ ﴿٢﴾
जिच्या घडून येण्यात काही खोटे नाही (२)

خَافِضَةٌ رَّافِعَةٌ ﴿٣﴾
ती नमवणारी आणि उच्चता देणारी असेल.[८] (३)

اِذَا رُجَّتِ الۡاَرۡضُ رَجًّا ﴿٤﴾
जेव्हा की जमीन धरणीकंपाने हलवून दिली जाईल. (४)

وَّ بُسَّتِ الۡجِبَالُ بَسًّا ﴿٥﴾
आणि पर्वत बिल्कूल कण कण करून दिले जातील.[९] (५)

فَکَانَتۡ هَبَآءً مُّنۡۢبَثًّا ﴿٦﴾
मग ते उधळलेल्या धुळीसारखे होऊन जातील. (६)

وَّ کُنۡتُمۡ اَزۡوَاجًا ثَلٰثَةً ﴿٧﴾
आणि तुम्ही तीन वर्गांत होऊन जाल,[१०] (७)

فَاَصۡحٰبُ الۡمَیۡمَنَةِ ۬ۙ مَاۤ اَصۡحٰبُ الۡمَیۡمَنَةِ ﴿٨﴾
तर उजव्या हातवाले किती चांगले आहेत उजव्या हातवाले[११] (८)

१) जेव्हा की पहिल्या दोन बागांच्या वैशिष्टयात सांगण्यात आले आहे. कीं, प्रत्येक फळ दोन प्रकारचे असेल. उघड आहे याच्यात प्रतिष्ठा आणि कृपेची जी अधिकता आहे, ती दुसऱ्या गोष्टीत नाही.

२) 'खय्‌रातून' ने अभिप्रेत, चारित्र्य आणि कर्तृत्वाच्या खुब्या आहेत. आणि 'हिसानून्' चा अर्थ आहे. रूपसौंदर्यात

एकटीं(च).
३) हदीसमध्ये नबी ﷺ नी फर्माविले, ''स्वर्गात मोत्यांचे तंबू असतील त्यांचा व्यास साठ मैल असेल. त्याच्या प्रत्येक कोपऱ्यांत स्वर्गवाश्यांचे कुंटुंबीय असतील, ज्यांना दुसऱ्या कोपऱ्यावाले पाहू शकणार नाही. ईमानवाला यांच्यात फिरेल.'' (स.बुखारी, तफसीर सु. रहमान व स. मुस्लिम)
४) 'रफरफीन' गालीचा किंवा या प्रकारची सुंदर बिछाईत. 'अबकरी' प्रत्येक उमद्या आणि उच्च दर्जाच्या वस्तुला म्हणण्यात येते. नबी ﷺ नी ह. उमर ؓ करीता हा शब्द उपयोगात आणला. ''मी कोणी असा अबकरी पाहिला नाही जो उमरसारखा काम करीत असेल.'' (अल्बुखारी) अर्थ हा आहे की स्वर्गवाशी अशा तख्तांवर बसलेले असतील ज्यांच्यावर हिरव्या रंगाच्या मसनदी, गालीचे आणि उच्च प्रकारच्या सुंदर, नक्षी काम केलेल्या बिछायती असतील.
५) हे महावाक्य या अध्यायात ३१ वेळा आलेले आहे. अल्लाहृतआलाने या अध्यायात, आपल्या नाना प्रकारच्या देणग्यांचा उल्लेख केलेला आहे. आणि प्रत्येक देणगी, किंवा देणग्यांच्या उल्लेखानंतर हा प्रश्न विचारला आहे. येथपावेतो की हशरच्या मैदानातील भयानकता आणि नरकाग्नीच्या शिक्षानंतर सुध्दा हा प्रश्न विचारण्यात आला आहे, ज्याचा अर्थ हा आहे की परलोकातील कामांची आठवण करून देणे सुध्दा मोठीच देणगी आहे. कारण की वाचणाऱ्यांनी यापासून बचावाचा प्रयत्न करून घ्यावा. दुसरी गोष्ट ही ठाऊक झाली की जिन्न सुध्दा मनुष्यासारखी अल्लाहृची एक सृष्टी आहे. किंबुहना मानवानंतर ही दुसरी सृष्टी आहे, जिला बुध्दी आणि जाण बहाल केली गेली आहे. आणि याच्या बदल्यात त्यांच्याकडून फक्त या कामाचा तगादा करण्यात आला आहे की, त्यांनी फक्त एका अल्लाहृची उपासना करावी. त्याच्या बरोबर कोणाला सरकतदार ठरवू नये. सृष्टी मध्ये हेच दोन आहेत, जे धर्म शास्त्रीय आदेश आणि कर्तव्ये (फर्ज) यांना बांधिलदार आहेत. म्हणूनच त्यांना इरादा आणि अखत्याराचे स्वातंत्र्य देण्यात आले आहे. यासाठी की त्यांची कसोटी घेतली जाऊ शकावी. तिसरे देणग्यांच्या वर्णनाने हे पण सिध्द झाले कीं अल्लाहृच्या देणग्यांपासून फायदा उचलणे योग्य आणि पसंत केले गेले आहे. हे सदाचरण आणि ईशभयांच्या विरूध्द आहे, न अल्लाहशी संबंध जोडण्याला अडथळा करणारे, जसे की काही सुफी लोक म्हणतात. चौथे, वारंवार हा प्रश्न कीं तुम्ही अल्लाहच्या कोणकोणत्या देणग्यांस खोटे ठरवाल ? हे कानउघाडणी आणि धमकाविणे म्हणून आहे. ज्याचा अर्थ अल्लाहृच्या त्या आज्ञाभंजना पासून वाचविणे आहे, ज्याने या सर्व देणग्या निर्माण आणि प्राप्य करून दिल्या याच करिता नबी सल्लल्लाहु अलैहि सल्लमनी याच्या उत्तरात हे म्हणणे पसंत केले, ''ला बिशय्इम् मिन् निअमिक रब्बना नुकज्जिबु फलकल् हम्द.'' ''हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही तुझ्या कोणत्याही देणगीला खोटे ठरवीत नाही. तर सर्व स्तुती तुझ्याच करता आहे.'' (सुनन तिर्मिझी) परंतु नमाजीत हे उत्तर देणे बरोबर नाही.
६) 'तबारक' बरकत पासून आहे. ज्याचा अर्थ नित्याचे आणि कायम रहाणे आहे. म्हणजे त्याचे नाव नेहमी राहणारे आहे. किंवा याच्याजवळ नेहमी भलाईचे खजीने आहेत. काहींनी याचा अर्थ महानता आणि उच्च शानवाला असा केला आहे. आणि जेव्हा याचे नाव इतके शुभकारक आहे, म्हणजे भलाई आणि महानतेला धारण करणारे आहे, तर त्याचे व्यक्तीत्व किती शुभकारक आणि महान् व उच्च असेल.
✪ या अध्यायाच्या बाबतीत मशहुर आहे की हा अध्याय 'सुरतुलगिना' (श्रीमंती चा अध्याय) आहे. आणि जो मनुष्य याला दररोज रात्री वाचील, त्याची कधी उपासमार होणार नाही. परंतु खरी गोष्ट ही आहे कीं, या अध्यायाच्या मोठे पणात (फजीलत मध्ये) कोणी सनदशीर रिवायत नाही. दररोज रात्री वाचणाऱ्या आणि मुलांना शिकविणाऱ्या रिवायती सुध्दा जईफ किंबहुना मौजुअ (मनघडत). आहेत.(कृपया पहावे अल्अहदिसुस जय्फिया)
७) वाकेअ: पण कयामतच्या नावामधून एक नाव आहे. कारण की ही खरोखरच घडून येणारी आहे. म्हणून तिचे हे नाव पण आहे.
८) खोली आणि उच्चतेने अर्थ फजिती आणि प्रतिष्ठा आहे. म्हणजे अल्लाहृच्या आज्ञाधारक सेवकांना ही उच्चता देईल आणि आज्ञाभंजकांना ही नमवेल मग जरी जगात मामला याचे उलट असेल. ईमानवाले तेथे प्रतिष्ठीत आणि सानिध्य प्राप्त असलेले असतील. आणि कुफ्रवाले,गुन्हेगार आणि अप्रतिष्ठीत आणि फजीत असतील.
९) 'रज्जान' चा अर्थ आहे हालचाल आणि भूकंप आणि 'बुस्स' चा अर्थ कणकण होऊन जाण्याचा आहे.
१०) 'अजवाजन्', 'असनाफन्' च्या अर्थांत आहे. म्हणजे जोडी-जोडी किंवा समूह समूह.
११) याच्याने सर्व साधारण ईमानवाले अभिप्रेत आहेत. ज्यांना त्यांची कर्मपत्रे उजव्या हातात दिली जातील, जे त्यांच्या सद्भाग्याचे चिन्ह असेल.

وَ اَصْحٰبُ الْمَشْـَٔمَةِ ۙ مَاۤ اَصْحٰبُ الْمَشْـَٔمَةِ ۝٩
आणि डाव्या हातवाले काय दुर्गत आहे डाव्या हात वाल्यांची[१] ९

وَالسّٰبِقُوْنَ السّٰبِقُوْنَ ۝١٠
आणि जे पुढे आहेत, ते तर पुढेच रहाणारे आहेत.[२] १०

اُولٰٓئِكَ الْمُقَرَّبُوْنَ ۝١١
ते बिल्कुल सानिध्य प्राप्त झालेले आहेत ११

فِىْ جَنّٰتِ النَّعِيْمِ ۝١٢
ऐष आरामाच्या स्वर्गात आहेत १२

ثُلَّةٌ مِّنَ الْاَوَّلِيْنَ ۝١٣
(फार मोठा) समुदाय तर पूर्वीच्या लोकांमधून असेल. १३

وَ قَلِيْلٌ مِّنَ الْاٰخِرِيْنَ ۝١٤
आणि थोडेसे मागील लोकांमधून[३] १४

عَلٰى سُرُرٍ مَّوْضُوْنَةٍ ۝١٥
हे लोक सोन्याच्या तारांनी बनविलेल्या तख्तांवर, १५

مُّتَّكِـِٕيْنَ عَلَيْهَا مُتَقٰبِلِيْنَ ۝١٦
एक दुसऱ्याच्या समोर तक्के लाऊन बसलेले असतील[४] १६

يَطُوْفُ عَلَيْهِمْ وِلْدَانٌ مُّخَلَّدُوْنَ ۝١٧
यांच्या जवळ अशी मुले, जी नित्य (मुलेच)[५] बनून राहतील, येत जात असतील. १७

بِاَكْوَابٍ وَّ اَبَارِيْقَ ۙ وَ كَاْسٍ مِّنْ مَّعِيْنٍ ۝١٨
आबखोरे आणि तोटीदार तांबे घेऊन, आणि असे पेले घेऊन, जे मद्याने भरलेले असतील. १८

لَّا يُصَدَّعُوْنَ عَنْهَا وَ لَا يُنْزِفُوْنَ ۝١٩
ज्याच्याने न डोक्यात दुखेल न बुध्दीभ्रंश होईल.[६] १९

وَ فَاكِهَةٍ مِّمَّا يَتَخَيَّرُوْنَ ۝٢٠
आणि असे मेवे, जे ते पसंत करतील. २०

وَ لَحْمِ طَيْرٍ مِّمَّا يَشْتَهُوْنَ ۝٢١
आणि पक्ष्यांचे मांस जे त्यांच्या आवडीचे असेल. २१

وَ حُوْرٌ عِيْنٌ ۝٢٢
आणि मोठ्या मोठ्या डोळ्यांवाल्या अप्सरा. २२

كَاَمْثَالِ اللُّؤْلُؤِ الْمَكْنُوْنِ ۝٢٣
ज्या झाकलेल्या मोत्यांप्रमाणे (सुंदर) आहेत.[७] २३

جَزَآءًۢ بِمَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ۝٢٤
हा मोबदला आहे त्यांच्या कर्मांचा. २४

لَا يَسْمَعُوْنَ فِيْهَا لَغْوًا وَّ لَا تَاْثِيْمًا ۝٢٥
न तेथे ते निरर्थक गोष्ट ऐकतील न कोण्या पातकाची गोष्ट. २५

اِلَّا قِيْلًا سَلٰمًا سَلٰمًا ۝٢٦
फक्त सलाम सलामचे आवाज येतील.[८] २६

وَ اَصْحٰبُ الْيَمِيْنِ ۙ مَاۤ اَصْحٰبُ الْيَمِيْنِ ۝٢٧
आणि उजव्या हातवाले! किती चांगले आहेत उजव्या हातवाले[९] २७

فِىْ سِدْرٍ مَّخْضُوْدٍ ۝٢٨
ते बिन काट्यांच्या बोरीत, २८

وَّ طَلْحٍ مَّنْضُوْدٍ ۝٢٩
आणि फळांनी लादलेल्या केळ्यात २९

وَّ ظِلٍّ مَّمْدُوْدٍ ۝٣٠
आणि लांब लांब सावलीत,[१०] ३०

وَّ مَآءٍ مَّسْكُوْبٍ ۝٣١
आणि वहात्या पाण्यात, ३१

وَّ فَاكِهَةٍ كَثِيْرَةٍ ۝٣٢
आणि भरपूर फळांमध्ये, ३२

१) याच्याने अभिप्रेत काफिर आहेत, ज्यांना त्यांची कर्मपत्रे डाव्या हाता धरविली जातील

२) याच्याने अभिप्रेत विशेष ईमानवाले आहे. हा तिसरा प्रकार आहेत.जे ईमान कबूल करण्यात अग्रेसर राहणारे पुण्याच्या कामात आघाडीवर राहून भाग घेणारे आहेत. अल्लाहूतआला त्यांना खास सानिध्य बहाल करीन. ही मांडणी अशीच आहे जसे म्हणतात तू तू आहेस आणि जैद जैद. याच्यात जणू जैदच्या महत्त्वाचे आणि श्रेष्ठत्वाचे वर्णन आहे.

३) 'सुल्लतून्' त्या मोठ्या समुदायाला म्हटले जाते, ज्याचे मोजणे कठीण असावे. असे सांगण्यात येते कीं, 'अव्वलीन' ने अभिप्रेत ह. आदम عليه السلام पासून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम पर्यंतच्या समुदाया पर्यंतचे लोक आहेत आणि 'आखरीन' ने उम्मते मुहम्मदियाची माणसे आहेत. अर्थ आहे की मागच्या उम्मती मध्ये अग्रेसर राहणाऱ्यांचा एक मोठा समुदाय आहे. कारण की त्यांचा काळ फार दीर्घ आहे; ज्यात हजारो पैगंबरांचे अग्रेसर लोक शामील आहेत. याच्या तुलनेत उम्मते मुहम्मदियाचा काळ (कयामत पर्यंत) थोडा आहे. म्हणून याच्या मध्ये अग्रेसर रहाणारे लोक, सुध्दा मागील उम्मतींच्या तुलनेत थोडे असतील आणि एका हदीसमध्ये जे येते ज्यात नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले की, ''मला आशा आहे की तुम्ही स्वर्गवाश्यांच्या अर्धे असाल.'' (स. मुस्लीम क्र. २००) तर हे महावाक्य चर्चित भावार्थाच्या विरोधात नाही कारण की उम्मते मुहम्मदियाचे अग्रेसर आणि सर्व साधारण ईमानवाले मिळवून बाकी सर्व उम्मतीपेक्षा स्वर्गांत जाणाऱ्यांच्या अर्धे होऊन जातील; म्हणूनच निव्वळ अग्रेसर लोकांच्या विपुलतेने (मागील उम्मतीमध्ये) हदीसमध्ये सांगण्यात आलेल्या संख्येचे निराकरण होणार नाही. परंतु हे म्हणणे विचारपूर्वक आहे. काहींनी अव्वलीन आणि आखरीनने याच उम्मते मुहम्मदियाची माणसे अभिप्रेत धरली आहेत. म्हणजे यांच्या पूर्वीच्या लोकांत अग्रेसर रहाणाऱ्यांची संख्या जास्त आणि मागील लोकांत थोडी असेल. इमाम इब्ने कसीरने याच दुसऱ्या म्हणण्याला प्राधान्य दिले आहे. आणि हेच जास्त बरोबर वाटते.

४) 'मवजूनतून,' विणलेले, जडविलेले म्हणजे चर्चित स्वर्गवासी सोन्याच्या तारांनी विणलेले आणि सोने आणि रत्नांनी जडविलेल्या तख्त्यावर एक दुसऱ्यांच्या समोर तक्के लाऊन बसलेले असतील. म्हणजे समोरासमोर असतील न की पाठीला पाठ लाऊन असतील.

५) म्हणजे ते मोठे नसतील की, म्हातारे होऊन जावेत न त्यांच्या त्वचेत आणि अगंकाठीत काही बदल घडून येईल. किंबहुना एकाच वयावर आणि एकाच स्थितीवर राहतील. जसे नवे तरूण मुलगे असतात.

६) 'सुदाअ' अशा डोकी दुखीला म्हणतात, जी मद्याच्या नशेने आणि उत्तेजनेमुळे होते. आणि 'इन्जाफ' चा अर्थ तो बुध्दी भ्रंश जो धुंदीमुळे असावा. जगातील मद्याच्या परिणामात, या दोन्ही गोष्टी होतात. परलोकातील मद्यामध्ये तो आनंद आणि स्वाद तर खचित्च राहील, परंतु या वाईट गोष्टी होणार नाहीं. 'मईन' वाहता झरा जो कधी कोरडा न व्हावा.

७) 'मकनून' ज्याला लपवून ठेवले गेले; ज्याला कोणाचे हात लागले नसतील किंवा झळ त्याला पोहचली नसेल. अशी वस्तू बिलकूल स्वच्छ आणि मूळ स्थितीत रहाते.

८) म्हणजे जगात तर आपसात लढाई झगडेच होतात. येथपावेतो की बहीण भाऊ सुध्दा यापासून सुरक्षित नाहीत. या मतभेद आणि झगड्याने मनात गढुळता आणि व्देष व तिरस्कार निर्माण होतो. जो एक दुसऱ्याच्या विरूध्द बरे वाईट बोलणे, शिवीगाळ, टोमणे मारणे, निंदा, चुगल्या करणे वगैरे वर माणसाला उभारतो. स्वर्ग या सर्व चारित्र्य विषयक घाणेरडापण आणि वाह्यात गोष्टी पासून न नुसता पवित्र असेल किंबहुना तेथे सलाम आणि सलामचेच आवाज ऐकावयास येतील; देवदुतांकडून सुध्दांआणि आपसात स्वर्गवाल्यांकडून सुध्दा. ज्याचा अर्थ आहे कीं तेथे सलाम आणि दुआ तर असेल, परंतु मन आणि जिभेचा तो वाईटपणा नसेल, जो जगात सर्वत्र आढळून येतो. येथपावेतो की मोठमोठे दीनदार लोक सुध्दा यापासून सुरक्षित नाहीत.

९) आतापर्यंत अग्रेसर (सानिध्य प्राप्त) लोकांचे वर्णन होते. असहाबुल यमीन ने आता सर्व साधारण ईमानवाल्यांचा उल्लेख होत आहे.

१०) जसे एका हदीस मध्यें आहे कीं, ''स्वर्गातील एका झाडाच्या सावली खाली एक घोडे स्वार शंभर वर्षे पर्यंत चालत राहील, तरीही ती सावली संपणार नाही.''(स. बुखारी स.मुस्लिम)

जे न संपतील, न रोकून घेतले जातील [१] (३३) — لَّا مَقْطُوعَةٍ وَّلَا مَمْنُوعَةٍ ﴿٣٣﴾

आणि उंच उंच बिछाईतीत असतील. [२] (३४) — وَّفُرُشٍ مَّرْفُوعَةٍ ﴿٣٤﴾

आम्ही त्यांच्या (पत्न्यांना) विशेष म्हणून बनविले आहे. (३५) — اِنَّآ اَنْشَاْنٰهُنَّ اِنْشَآءً ﴿٣٥﴾

आणि आम्ही त्यांना कुवाऱ्या करून दिले आहे. [३] (३६) — فَجَعَلْنٰهُنَّ اَبْكَارًا ﴿٣٦﴾

त्या (आपल्या पतीस) प्रिय आणि समान वयाच्या आहेत. [४] (३७) — عُرُبًا اَتْرَابًا ﴿٣٧﴾

उजव्या हातावाल्यांसाठी आहेत. (३८) — لِّاَصْحٰبِ الْيَمِيْنِ ﴿٣٨﴾

(यांच्यातून) बहुतेक पूर्वीच्या लोकांमधून [५] (असतील) (३९) — ثُلَّةٌ مِّنَ الْاَوَّلِيْنَ ﴿٣٩﴾

आणि फार मोठा समुदाय आहे, मागील लोकांमधून [६] (४०) — وَثُلَّةٌ مِّنَ الْاٰخِرِيْنَ ﴿٤٠﴾

आणि डाव्या हातावाले काय आहेत डाव्या हातावाले? [७] (४१) — وَاَصْحٰبُ الشِّمَالِ مَآ اَصْحٰبُ الشِّمَالِ ﴿٤١﴾

उष्ण हवा आणि उष्ण पाण्यात (असतील) (४२) — فِيْ سَمُوْمٍ وَّحَمِيْمٍ ﴿٤٢﴾

आणि काळ्या कुट्ट धुराच्या सावलीत [८] (४३) — وَّظِلٍّ مِّنْ يَّحْمُوْمٍ ﴿٤٣﴾

१) म्हणजे ही फळे हंगामी असणार नाही की हंगाम चालला गेला कीं, तर ही फळे सुध्दा येत्या पिकापर्यंत गायब होऊन जावीत ही फळे अशा प्रकारे फुलाफळांच्या हंगामानुसार नसतील; किंबहुना वसंत आणि शिशीर आणि हिवाळा व उन्हाळा प्रत्येक मोसमात उपलब्ध असतील अशा प्रकारे त्यांना प्राप्त करून घेण्यात काही अडथळा येणार नाहीं.

२) काहींनी फुर्श ने पत्न्या आणि 'मरफुआ' ने उच्च मर्तबा असा भावार्थ घेतला आहे.

३) याच्याने अभिप्रेत स्वर्गवाल्यांना मिळणाऱ्या पत्न्या आणि मोठ्या डोळ्यांच्या अप्सरा आहेत. अप्सरा जन्मण्याच्या सर्व साधारण पध्दतीने पैदा झालेल्या नसतील. किंबहुना अल्लाहूतआला विशेष म्हणून त्यांना स्वर्गात आपल्या खास सामर्थ्याने बनवील आणि इहलौकिक स्त्रिया असतील आणि त्यापण अप्सरांशिवाय स्वर्गवासीयांना पत्न्या म्हणून मिळतील यांच्यात म्हातारी, काळी, कुरूप, ज्या पण प्रकारची असेल सर्वांना अल्लाहूतआला स्वर्गात, तारूण्य आणि रूपसौदर्य बहाल करील न कोणी म्हातारी म्हातारी राहील न कोणी कुरूप, कुरूप किंबहुना सर्व कुमाऱ्याच्या स्थितीत असतील.

४) 'उरूब' 'अरूबतून' चे अनेक वचन आहे. अशी स्त्री जी आपले रूपसौंदर्य आणि दुसऱ्या खुब्यामुळे पतीला फारच प्रिय असेल 'अतराब' 'तरब' चे अनेक वचन आहे. समवयस्क, म्हणजे सर्व स्त्रिया ज्या स्वर्गवाशांना मिळतील, एकाच वयाच्या असतील. जसे की हदीसमध्ये सांगण्यात आले आहे. की सर्व स्वर्गवासी ३३ वर्ष वयाचे असतील. (तिर्मिझी) किंवा अर्थ आहे की पतींच्या समवयस्क असतील अर्थ दोन्ही स्वरूपात एकच आहे.

५) म्हणजे ह. आदम عليه السلام पासून नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लम पर्यंत, च्या लोकांमधून किंवा खुद्द उम्मते मुहम्मदीयाच्या पूर्वीच्या लोकांमधून.

६) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम च्या उम्मतीमधून किंवा आपल्या उम्मतीच्या मागील लोकांमधून.

७) याच्याने अभिप्रेत नरकाग्नीवाले आहेत ज्यांना त्यांची कर्म पत्रे डाव्या हातात धरून दिले जातील.

८) 'समूम' अग्नीची उष्णता किंवा उष्ण हवा, जी शरीराच्या रंध्रात घुसून जाईल. 'हमीम' उकळते पाणी 'यहमुम' म्हणजे 'काळा' च्या आणि अहम म्हणजे काळीच्या अर्थात. फार जास्त कालक्ष वस्तू असेल तर म्हटले जाते. यहमुम म्हणजे काळा कुट्ट धूर. अर्थ हा आहे की नरकाग्नी च्या शिक्षेपासून त्रासून ते एका छायेखाली पळतील, परंतु जेव्हा तेथे पोहचतील तेव्हा ठाऊक होईल कीं, सावली नाही नरकाग्नीच्याच आगीचा फारच काळाकुट्ट धूर आहे. काही म्हणतात कीं हे 'हम्म' पासून आहे. जे त्या चरबीला म्हणतात जी आगीत जळून जळून काळी होऊन गेली असेल. काही म्हणतात हे 'हिमम' पासून आहे जे कोळशाच्या अर्थात आहे. म्हणून इमाम जहहाक फर्मावितात, आग पण काळी आहे. नर्कवासी सुध्दा काळ्या चेहऱ्याचे असतील आणि नरकाग्नीत जे काही पण असेल, काळेच असेल. अल्लाहुम्मा अजिरना मिनन् नार!

لَّا بَارِدٍ وَّلَا كَرِيمٍ ﴿٤٤﴾
**जो न थंडगार आहे, न अल्हाददायक[१] (४४)**

إِنَّهُمْ كَانُوا قَبْلَ ذَٰلِكَ مُتْرَفِينَ ﴿٤٥﴾
**नि:संशय हे लोक याच्यापूर्वी जगात फारच सुख वस्तू होते.[२] (४५)**

وَكَانُوا يُصِرُّونَ عَلَى الْحِنثِ الْعَظِيمِ ﴿٤٦﴾
**आणि मोठ मोठ्या गुन्हयावर आग्रह धरीत होते. (४६)**

وَكَانُوا يَقُولُونَ أَئِذَا مِتْنَا وَكُنَّا تُرَابًا وَعِظَامًا أَإِنَّا لَمَبْعُوثُونَ ﴿٤٧﴾
**आणि म्हणत असत की, काय जेव्हा आम्ही मरून जाऊ आणि माती आणि हाडके होऊन जाऊ, तर काय आम्ही दुसऱ्यांदा उभे केले जाऊ? (४७)**

أَوَآبَاؤُنَا الْأَوَّلُونَ ﴿٤٨﴾
**आणि काय आमचे पूर्वीचे वाडवडील सुध्दा?[३] (४८)**

قُلْ إِنَّ الْأَوَّلِينَ وَالْآخِرِينَ ﴿٤٩﴾
**आपण सांगून द्या की खचित्‌च सर्व पूर्वीचे आणि मागील. (४९)**

لَمَجْمُوعُونَ إِلَىٰ مِيقَاتِ يَوْمٍ مَّعْلُومٍ ﴿٥٠﴾
**अवश्य जमा केले जातील; एक निश्चित दिवसाच्या वेळेवर. (५०)**

ثُمَّ إِنَّكُمْ أَيُّهَا الضَّالُّونَ الْمُكَذِّبُونَ ﴿٥١﴾
**तर तुम्ही हे आडमार्गी भटकणाऱ्यांनो! आणि खोटे ठरवणाऱ्यांनो! (५१)**

لَآكِلُونَ مِن شَجَرٍ مِّن زَقُّومٍ ﴿٥٢﴾
**नक्कीच खाणार आहात निवडुंगाचे झाड. (५२)**

فَمَالِئُونَ مِنْهَا الْبُطُونَ ﴿٥٣﴾
**आणि याच्यानेच पोट भरणार आहात[४] (५३)**

فَشَارِبُونَ عَلَيْهِ مِنَ الْحَمِيمِ ﴿٥٤﴾
**मग याच्यावर गरम उकळते पाणी पिणार आहात (५४)**

فَشَارِبُونَ شُرْبَ الْهِيمِ ﴿٥٥﴾
**मग पिणारे सुध्दा तान्हेल्या उंटाप्रमाणे[५] (५५)**

هَٰذَا نُزُلُهُمْ يَوْمَ الدِّينِ ﴿٥٦﴾
**कयामतच्या दिवशी हा त्यांचा पाहुणचार आहे.[६] (५६)**

نَحْنُ خَلَقْنَاكُمْ فَلَوْلَا تُصَدِّقُونَ ﴿٥٧﴾
**आम्ही तुम्हा सर्वांस निर्माण केले आहे. मग तुम्ही का म्हणून खरे समजत नाही?[७] (५७)**

أَفَرَأَيْتُم مَّا تُمْنُونَ ﴿٥٨﴾
**बरे तर मग हे तर सांगा की जे वीर्य तुम्ही टपकवतात, (५८)**

१) म्हणजे सावली गार असते. परंतु हे जिला सावली समजत असतील ती सावलीच नसेल, जी गार असावी तो तर नरकाग्नीचा धूर असेल. वला करीम ज्यामध्ये काही सुंदर दृष्य किंवा भलाई नाही किंवा मिठास नाही.

२) म्हणजे जगात परलोकाकडून गाफील होऊन ऐष आरामाच्या आयुष्यात बुडालेले होते.

३) याच्याने ठाऊक झाले की, परलोकाच्या धारणेचा इन्कारच कुफ्र शिर्क आणि गुन्हयांमध्ये बुडून राहण्याची मूळ सबब आहे. हेच कारण आहे कीं, जेव्हा परलोकाची कल्पना, त्याच्या मानणाऱ्यांच्या डोक्यात धुसर होऊन जाते तर त्यांच्यात सुध्दा कुकृत्ये करणे सर्व साधारण होऊन जाते. जशी आज काल सर्व साधारण मुसलमानांची स्थिती आहे.

४) म्हणजे या दिसण्यात कुरूप, आणि फारच दुर्गंध युक्त आणि तीव्र वृक्षाचे खाणे तुम्हास जरी सक्त असह्य होईल, परंतु भुकेच्या तिव्रतेने तुम्हास याच्यानेच आपले पोट भरावे लागेल.

५) 'हीमुन' अहयमूचे अनेकवचन आहे. त्या तान्हेल्या उंटांना म्हटले जाते, जे एका खास आजारामुळे पाण्यावर पाणी पित जातात. परंतु त्यांची तहान भागत नाही. अर्थ हा आहे की निवडुंग खाल्ल्यानंतर, पाणी पण अशाप्रकारे पिणार नाही जसे नेहमी पितात. किंबहुना एक शिक्षा म्हणून तुम्हास पिण्यासाठी उकळते पाणी मिळेल. दुसरे तुम्ही त्याला तान्हेल्या उंटाप्रमाणे पितच चालले जाल. परंतु तुमची तहान भागणार नाही.

६) हे उपहास म्हणून आणि थट्टा म्हणून सांगितले नाहीतर पाहुणचार तर तो असतो, जो पाहुण्याच्या आदर सन्मानासाठी तयार केला जातो. हे असेच आहे, जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''त्यांना दु:खदायक शिक्षेची खुषखबर ऐकवून द्या!'' (सू.आले इमरान-२१)

७) म्हणजे तुम्ही जाणतात की तुम्हाला पैदा करणारा अल्लाहच आहे. मग तुम्ही त्याला का मानीत नाही? किंवा दुसऱ्यांदा जिवंत करण्यावर विश्वास का ठेवित नाही?

ءَاَنْتُمْ تَخْلُقُوْنَهٗۤ اَمْ نَحْنُ الْخٰلِقُوْنَ ﴿٥٩﴾
काय त्याच्या पासून तुम्ही (माणूस) बनविता की निर्माण करणारे आम्हीच आहोत.[१] (५९)

نَحْنُ قَدَّرْنَا بَيْنَكُمُ الْمَوْتَ وَمَا نَحْنُ بِمَسْبُوْقِيْنَ ﴿٦٠﴾
आम्हीच तुमच्यात मृत्यूला निश्चित करून दिले आहे.[२] आणि आम्ही याच्यापासून असमर्थ नाही.[३] (६०)

عَلٰۤى اَنْ نُّبَدِّلَ اَمْثَالَكُمْ وَنُنْشِئَكُمْ فِيْ مَا لَا تَعْلَمُوْنَ ﴿٦١﴾
की तुमच्याजागी तुमच्यासारखे आणखी निर्माण करून टाकू; आणि तुम्हास सुरवातीपासूनच त्या जगतात निर्माण करून टाकू ज्यापासून तुम्ही (बिल्कुल) अजाण आहात[४] (६१)

وَلَقَدْ عَلِمْتُمُ النَّشْاَةَ الْاُوْلٰى فَلَوْلَا تَذَكَّرُوْنَ ﴿٦٢﴾
तुम्हास खचित्‌च पहिल्यावेळचे निर्माण करणे ठाऊकच आहे, मग का (म्हणून) धडा घेत नाही?[५] (६२)

اَفَرَءَيْتُمْ مَّا تَحْرُثُوْنَ ﴿٦٣﴾
बरे हे पण सांगा की, तुम्ही जे काही पेरता, (६३)

ءَاَنْتُمْ تَزْرَعُوْنَهٗۤ اَمْ نَحْنُ الزّٰرِعُوْنَ ﴿٦٤﴾
त्याला तुम्हीच उगविता कीं, आम्ही उगविणारे आहोत.[६] (६४)

لَوْ نَشَآءُ لَجَعَلْنٰهُ حُطَامًا فَظَلْتُمْ تَفَكَّهُوْنَ ﴿٦٥﴾
जर आम्ही इच्छू तर त्यांचा चुरा चुरा करून टाकू आणि तुम्ही कौतुकाने बाताच बनवीत राहाल.[७] (६५)

اِنَّا لَمُغْرَمُوْنَ ﴿٦٦﴾
की आमच्यावर तर भुर्दंडच पडून गेला.[८] (६६)

بَلْ نَحْنُ مَحْرُوْمُوْنَ ﴿٦٧﴾
किंबहुना, आम्ही तर बिल्कुल वंचितच राहून गेलो. (६७)

اَفَرَءَيْتُمُ الْمَآءَ الَّذِيْ تَشْرَبُوْنَ ﴿٦٨﴾
बरे! हे सांगा! की ज्या पाण्यास तुम्ही पिता (६८)

ءَاَنْتُمْ اَنْزَلْتُمُوْهُ مِنَ الْمُزْنِ اَمْ نَحْنُ الْمُنْزِلُوْنَ ﴿٦٩﴾
त्याला ढगांतून सुध्दा तुम्हीच उतारता का आम्ही वर्षवितो ? (६९)

لَوْ نَشَآءُ جَعَلْنٰهُ اُجَاجًا فَلَوْلَا تَشْكُرُوْنَ ﴿٧٠﴾
जर आमची इच्छा असेल तर आम्ही त्याला कडू जहर करून टाकू तर तुम्ही आमचे आभार का मानीत नाहीत?[९] (७०)

اَفَرَءَيْتُمُ النَّارَ الَّتِيْ تُوْرُوْنَ ﴿٧١﴾
बरे! जरा हे पण सांगा की, जी आग तुम्ही पेटविता, (७१)

ءَاَنْتُمْ اَنْشَاْتُمْ شَجَرَتَهَاۤ اَمْ نَحْنُ الْمُنْشِـُٔوْنَ ﴿٧٢﴾
त्याच्या झाडाला तुम्ही निर्माण केले आहे किंवा आम्ही त्याचे निर्माण करणारे आहोत?[१०] (७२)

نَحْنُ جَعَلْنٰهَا تَذْكِرَةً وَّمَتَاعًا لِّلْمُقْوِيْنَ ﴿٧٣﴾
आम्ही तिला उपदेशाला कारणीभूत बनविले आहे;[११] आणि प्रवाशांच्या फायद्याची वस्तू बनविले आहे.[१२] (७३)

२ ३६ १५ فَسَبِّحْ بِاسْمِ رَبِّكَ الْعَظِيْمِ ﴿٧٤﴾ ع ٢ ٣٦ ١٥ الثلثة
तर आपल्या महीमाशाली पालनकर्त्याच्या नावाचे पावित्र्य वर्णित रहा (७४)

فَلَاۤ اُقْسِمُ بِمَوٰقِعِ النُّجُوْمِ ﴿٧٥﴾
तथापि मी शपथ खातो नक्षत्रांच्या तुटण्याची[१३] (७५)

وَاِنَّهٗ لَقَسَمٌ لَّوْ تَعْلَمُوْنَ عَظِيْمٌ ﴿٧٦﴾
आणि जर तुम्हास ज्ञान असेल तर ही फार मोठी शपथ आहे. (७६)

اِنَّهٗ لَقُرْاٰنٌ كَرِيْمٌ ﴿٧٧﴾
कीं, नि:संशय हे कुरआन फार मोठ्या आदर सन्मानाचे आहे.[१४] (७७)

فِيْ كِتٰبٍ مَّكْنُوْنٍ ﴿٧٨﴾
जे एका सुरक्षित पुस्तकात लिहिलेले आहे.[१५] (७८)

१) म्हणजे तुमच्या पत्नीशीं संभोग करण्याच्या परिणामात तुमचे जे विर्याचे थेंब पत्नीच्या गर्भाशयात जातात, यापासून मानवी चेहरा मोहरा बनविणारे आम्ही आहोत का तुम्ही?

२) म्हणजे प्रत्येक मनुष्याचा मृत्युचा वेळ नक्की करून दिला आहे. ज्यापासून कोणी मागे पुढे जाऊ शकत नाही. म्हणून कोणी बालपणात, कोणी तारूण्यात आणि कोणी म्हातारपणी मृत्यु पावतो.

३) किंवा पराजीत आणि असमर्थ नाही, किंबहुना सर्व शक्तीमान आहे.
४) म्हणजे तुमचे चेहरे विद्रुप करून तुम्हास माकडे किंवा डुकरे बनवून द्यावे, आणि तुमच्या जागी तुमच्याच चेहऱ्यामोहऱ्याची आणखी कोणी सृष्टी बनवून द्यावी.
५) म्हणजे हे का नाही समजत की, ज्याप्रमाणे त्याने तुम्हास पहिल्या वेळेस निर्माण केले (ज्याचे तुम्हास ज्ञान आहे) तो दुसऱ्यांदा सुध्दा तुम्हास निर्माण करू शकतो.
६) म्हणजे जमिनीत तुम्ही जे बी पेरतां, त्यापासून एक झाड जमिनीवर दिसू लागते. धान्याच्या एका निर्जीव दाण्याला फाडून आणि जमिनीच्या छातीला चिरून अशा प्रकारे झाड उगविणारा कोण आहे? हे पण वीर्याच्या थेंबापासून मनुष्य बनवून देण्याप्रमाणे आमच्याच सामर्थ्याचा नमुना आहे.
७) म्हणजे शेतीला हिरवीगार आणि सुपिक केल्यानंतर जेव्हा ती पिकावयास येईल, तेव्हा जर आम्ही इच्छू तर तिला कोरडी कुरुप चुरा चुरा करून टाकू; आणि तुम्ही आश्चर्याने तोंडच पाहात राहाल.
८) म्हणजे आम्ही पहिले जमिनीवर नांगर चालवून तिला ठीक केले. मग बी टाकले मग त्याला पाणी देत राहिलो परंतु जेव्हा पिकाच्या पिकण्याचा वेळ आला, तेव्हा ते कोरडे होऊन गेले; आणि आम्हास काहीही मिळाले नाही म्हणजे हा सर्व खर्च आणि श्रम, एक भुर्दंडच झाला. जो आम्हास सहन करावा लागला भुर्दंडाचा अर्थ हाच असतो की मनुष्याला त्याच्या पैशाचा आणि श्रमाचा मोबदला मिळू नये. किंबहुना तो असाच निरर्थक जावा. किंवा जबरदस्ती त्याच्याकडून काही वसूल करून घेतले जावे. आणि त्याच्या बदल्यात त्याला काही न दिले जावे.
९) म्हणजे या उपकारावर आमचे आज्ञापालन करुन आमचे कार्मिक आभार का मानत नाहीत?
१०) असे म्हणतात कीं, अरबस्थानात दोन वृक्ष आहेत. मिर्ख आणि इफाद त्या दोहोंपासून फांद्या घेऊन त्यांना आपसात घासले जाईल. तर त्यांच्यापासून आगीच्या ठिणग्या निघतात.
११) कीं, याचे परिणाम आणि फायदे, आश्चर्यकारक आहेत. आणि जगातील असंख्य वस्तूंच्या तयारीसाठी त्याची पाठीतील कण्याच्या हाडासारखी स्थिती आहे. जी आमच्या असीम सामर्थ्याची निशाणी आहे. मग आम्ही जगात ज्याप्रमाणे ही आग निर्माण केली आहे, आम्ही परलोकांत सुध्दा निर्माण करण्यास समर्थ आहोत जी इच्यापेक्षा ६९ पट उष्णतेत जास्त असेल (कमा फील् हदीस)
१२) 'मुकवीन' मुकवीचे अनेक वचन आहे. 'कवाअ' म्हणजे खाली वाळवंटात दाखल होणारा, अभिप्रेत प्रवाशी आहे. म्हणजे प्रवासी वाळवंटात आणि जंगलात या झाडापासून फायदा उचलतात. यापासून प्रकाश, उष्णता आणि इंधन प्राप्त करतात. काहींनी 'मुकवी' ने ते फकीर अभिप्रेत धरले आहेत, जे खाली पोट असावेत. काहींनी याचा अर्थ, 'मुस्तमतिईन' (फायदा उचलणारे) केला आहे. याच्यात श्रीमंत, गरीब, स्थायी आणि प्रवाशी सर्व येऊन जातात. आणि सर्वच अग्नी पासून फायदा उचलतात. म्हणूनच हदीस मध्ये ज्या तीन वस्तुंना सर्वांसाठी ठेवण्याचा आणि त्यांच्यापासून कोणाला न अडविण्याचा हुकूम देण्यात आला आहे, यांच्यात पाणी आणि गवता शिवाय आग पण आहे. (अबुदाऊद) इमाम इब्ने कसीर ने या भावार्थाला जास्त पसंत केले आहे.
१३) म्हणजे हे कुरआन कथन किंवा काव्य नाही. किंबहुना मी नक्षत्रांच्या तुटण्याची शपथ खाऊन म्हणतो कीं, हे कुरआन आदर सन्मानाचे आहे...........मवाकेऊन नुजूम ने अभिप्रेत नक्षत्रांच्या उदय आणि अस्त होण्याच्या जागा, आणि त्याच्या कक्षा आणि कला आहेत.
१४) हे शपथेचे उत्तर आहे.
१५) म्हणजे लौहे महफुज आहे.

لَّا يَمَسُّهٗۤ اِلَّا الْمُطَهَّرُوْنَ ﴿٧٩﴾
ज्याला फक्त पवित्र लोकच स्पर्श करू शकतात.[१] (७९)

تَنْزِيْلٌ مِّنْ رَّبِّ الْعٰلَمِيْنَ ﴿٨٠﴾
हे सकल जगाच्या पालनकर्त्याकडून अवतीर्ण झाले आहे. (८०)

اَفَبِهٰذَا الْحَدِيْثِ اَنْتُمْ مُّدْهِنُوْنَ ﴿٨١﴾
काय तुम्ही अशा गोष्टीला सोपी (आणि मामुली) समजत आहात?[२] (८१)

وَتَجْعَلُوْنَ رِزْقَكُمْ اَنَّكُمْ تُكَذِّبُوْنَ ﴿٨٢﴾
आणि आपल्या वाट्याला हेच घेतात की, (याला) खोटे ठरवत रहावे. (८२)

فَلَوْلَاۤ اِذَا بَلَغَتِ الْحُلْقُوْمَ ﴿٨٣﴾
तर की जेव्हा प्राण कंठापर्यंत पोहचून जाईल, (८३)

وَاَنْتُمْ حِيْنَئِذٍ تَنْظُرُوْنَ ﴿٨٤﴾
आणि तुम्ही त्या वेळेपर्यंत पाहात रहाल.[३] (८४)

وَنَحْنُ اَقْرَبُ اِلَيْهِ مِنْكُمْ وَلٰكِنْ لَّا تُبْصِرُوْنَ ﴿٨٥﴾
आम्ही तुमच्यापेक्षा त्या माणसाच्या जास्त जवळ असतो.[४] परंतु तुम्ही पाहू शकत नाही[५] (८५)

فَلَوْلَاۤ اِنْ كُنْتُمْ غَيْرَ مَدِيْنِيْنَ ﴿٨٦﴾
तेव्हा तर तुम्ही कोणाच्या आज्ञेखाली नाही; (८६)

تَرْجِعُوْنَهَاۤ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿٨٧﴾
आणि या म्हणण्यात खरे आहात तर त्या प्राणाला परतवून आणा.[६] (८७)

فَاَمَّاۤ اِنْ كَانَ مِنَ الْمُقَرَّبِيْنَ ﴿٨٨﴾
मग जो कोणी अल्लाहच्या दरबारात जवळ केलेला असेल;[७] (८८)

فَرَوْحٌ وَّرَيْحَانٌ ۙ وَّجَنَّتُ نَعِيْمٍ ﴿٨٩﴾
त्याला तर ऐष आराम आहे, आणि अन्नसंपत्ती आहे आणि सुखाचा स्वर्ग आहे. (८९)

وَاَمَّاۤ اِنْ كَانَ مِنْ اَصْحٰبِ الْيَمِيْنِ ﴿٩٠﴾
आणि जो मनुष्य उजव्या हातावाल्यामधून आहे;[८] (९०)

فَسَلٰمٌ لَّكَ مِنْ اَصْحٰبِ الْيَمِيْنِ ﴿٩١﴾
तर सलामती आहे तुझ्यासाठी तू की तू उजव्या हातावाल्यामधून आहेस (९१)

وَاَمَّاۤ اِنْ كَانَ مِنَ الْمُكَذِّبِيْنَ الضَّآلِّيْنَ ﴿٩٢﴾
पण जर कोणी खोटे ठरवणारा आणि आडमार्गी भटकणाऱ्यापैकी आहे;[९] (९२)

فَنُزُلٌ مِّنْ حَمِيْمٍ ﴿٩٣﴾
तर उकळत्या पाण्याचा पाहुणचार आहे. (९३)

وَّتَصْلِيَةُ جَحِيْمٍ ﴿٩٤﴾
आणि नर्कात जाणे आहे. (९४)

اِنَّ هٰذَا لَهُوَ حَقُّ الْيَقِيْنِ ﴿٩٥﴾
ही बातमी निव्वळ खरी आणि बिल्कुल निश्चित आहे. (९५)

ع ٣ ٢٢ ١٦ فَسَبِّحْ بِاسْمِ رَبِّكَ الْعَظِيْمِ ﴿٩٦﴾
तर तू आपल्या महीमाशाली पानलकर्त्याच्या नावाची पवित्रता वर्णीत रहा.[१०] (९६)

१) ला यमस्सुहु मध्ये जमीर चा मर्जा लौहे महफूज आहे. आणि पवित्र लोकांनी अभिप्रेत देवदूत. काहींनी याचा मर्जा कुरआन करीमला बनविले आहे. म्हणजे या कुरआनाला देवदुतच स्पर्श करतात. म्हणजे आकाशांवर देवदुतांशिवाय कोणाचीही पोहोच या कुरआनापर्यंत होत नाही. अर्थ मुशरिक लोकांचे खंडन आहे. जे म्हणत असत की कुरआन शैतान घेऊन उतरतात. अल्लाहने फर्माविले हे कसे काय शक्य आहे, हे कुरआन तर शैतानांच्या परिणामापासून बिल्कुल सुरक्षित आहे. काहींनी या वाक्यात नकाराला मना करण्याच्या अर्थात घेऊन असे म्हटले आहे की कुरआनाला बे वजू स्पर्श करणे आणि त्याचे वाचन करणे योग्य नाही. परंतु ही दलील बरोबर नाही यासाठी की, याच्यात फक्त एका गोष्टीची खबर दिली जात आहे; याला स्पर्श करणे किंवा न करण्याचा हुकूम वर्णन केला जात नाही. आणि या संदर्भात ज्या हदीसच्या रिवायती सांगितल्या जातात, त्याच्यात स्त्री संभोग केलेला. किंवा ऋतुमती, आणि बाळंत पणानंतर रक्त

टपकविणाऱ्या स्त्रिया (जास्तीत जास्त मुदत ४० दिवस) याच्या करीता, कुरआनाच्या तिलावतला मना करण्यात आले आहे, त्या सनदीच्या दृष्टीने जईफ आहेत. (तपशील करीता पहावे, नैलुल अवतार अशाचप्रकारे मौअत्ता इमाम मालीकची रिवायत'' फक्त पाक साफ मनुष्यानेच कुरआनाला स्पर्श करावा.'' याच्या सनदीपासून (याच्या शिवाय) नजर टाळून ही आपल्या भावार्थात स्पष्ट नाही कारण की या पाकसाफ होण्याने कुफ्र आणि शिर्कच्या घाणीपासून पाक होणे, अभिप्रेत होऊ शकते. ज्याचे समर्थन त्या हदीस ने होते जिच्यात फर्माविण्यात आले आहे की, ''मोमिन नापाक असत नाही.'' (मुत्तफिकन अलैह्) या नापाकीने अभिप्रेत तीच कुफ्र आणि शिर्कची नापाकी आहे. ज्याचा इन्कार एका ईमानवाल्या पासून केला गेला आहे. आणि या अनुषंगाने एक स्त्री संभोग केलेला ईमानवाला पण पाक आहे. नाहीतर समागम वगैरेची नापाकी, त्याला पण लागू पडते आणि त्याचे आदेश त्याच्या करीता सांगून देण्यात आले आहे.

२) हदीस ने अभिप्रेत कुरआन करीम आहे. 'मुदाहनत्' ती मृदुता जी कुफ्र आणि निफाकच्या मुकाबल्यात स्वीकारली जाईल. वास्तविक, यांच्या मुकाबल्यात सक्त वागणूकीची आवश्यकता आहे. म्हणजे या कुरआनाला अंगीकारण्याच्या मामल्यात सर्व काफिरांना खूष करण्याकरिता मृदुता आणि पळवाटीचा मार्ग अंगीकार करीत आहात. वास्तविक हे कुरआन जे चर्चित वैशिष्ट्य यांना धारण करणारे आहे, या योग्यतेचे आहे की त्याला फार आनंदाने स्वीकारले जावे.

३) म्हणजे प्राण निघताना पाहत रहातात. परंतु याला टाळण्याची किंवा त्याला काही फायदा पोहचण्याचे सामर्थ्य बाळगीत नाही.

४) म्हणजे मरणाऱ्याच्या आम्ही तुमच्यापेक्षा सुध्दा जास्त जवळ असतो. आपल्या ज्ञान, सामर्थ्य आणि दृष्याच्या अनुषंगाने. किंवा 'आम्ही' ने अभिप्रेत अल्लाह्चे काम करणारे म्हणजे मृत्युचे देवदूत आहेत, जे त्याचे प्राण हरण करतात.

५) म्हणजे आपल्या अज्ञानामुळे, तुम्हास या गोष्टीची जाणीव नाही कीं, अल्लाह्तर तुमच्या मानेच्या शिरेपेक्षा सुध्दा जास्त जवळ आहे. किंवा प्राण हरण करणाऱ्या देवदूतांना तुम्ही पाहू शकत नाही.

६) 'दान यदिनू' चा अर्थ आहे, अधिनस्थ होणे. दुसरा अर्थ आहे, बदला देणे म्हणजे जर तुम्ही या गोष्टीत खरे आहात की कोणी तुमचा धनी आणि मालक नाही ज्याच्या तुम्ही हुकूमाखाली आणि अधिनस्थ आहात किंवा कोणी मोबदला आणि शिक्षेचा दिवस येणार नाही; तर या हरण केलेल्या प्राणाला आपल्या जागी आणून दाखवा. आणि जर तुम्ही असे करू शकत नाही तर याचा स्पष्ट अर्थ हा आहे कीं, तुमची कल्पना चुकीची आहे. खचित्च तुमचा एक स्वामी आहे. आणि खचित्च एक दिवस येईल, ज्यात तो स्वामी, प्रत्येकाला त्याच्या कर्मांचा बदला देईन.

७) अध्यायाच्या प्रारंभी कर्माच्या दृष्टीने मनुष्यांचे जे तीन प्रकार सांगितले गेले होते, त्यांचा पुन्हा उल्लेख केला जात आहे हा त्याचा पहिला प्रकार आहे. ज्यांना सानिध्य प्राप्य (मुकर्रबीन) किंवा, पुढे रहाणारे (साबेकीन) पण म्हटले जाते कारण कीं ते पुण्याच्या प्रत्येक कामात पुढे पुढे राहतात आणि आपल्या याच खुबीमुळे ते अल्लाह्च्या दरबारात सानिध्य प्राप्त ठरविले जातात.

८) हा दुसरा प्रकार आहे. सर्व साधारण ईमानवाले हे पण नरकाग्नी पासून वाचून स्वर्गात जातील तथापि दर्जामध्ये साबेकीन पेक्षा कनिष्ठ असतील. मृत्यूच्या वेळी देवदूत त्यांना सुध्दा सलामतीची खुषखबर देतात.

९) हा तिसरा प्रकार आहे. ज्यांना अध्यायाच्या प्रारंभी 'असहाबुल मश्अमा' म्हटले गेले होते डाव्याहातावाले किंवा शापग्रस्त हे आपल्या कुफ्र आणि निफाकची शिक्षा किंवा त्यांचा वाईटपणा नरकाग्नीच्या शिक्षेने भोगतील.

१०) हदीसमध्ये येते कीं, दोन शब्द अल्लाह्ला खूप प्रिय आहेत. जिभेवर हलके आणि वजनात भारी सुब्हानल्लाहि व बिहम्दिही, सुबहानल्लाहिल् अजीम(स.बुखारी, स. मुस्लिम)

महावाक्ये २९ | रुकूअ ४

# (५७) सू. अल-हदीद

سورة الحديد (٥٧) مدنية (٩٤) آياتها ٢٩ ركوعاتها ٤

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

سَبَّحَ لِلّٰهِ مَا فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۚ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ۝١

आकाशात आणि पृथ्वीत जे आहेत (सर्व) अल्लाह्चे पावित्र्य वर्णन करीत आहेत.[१] तो सामर्थ्यवान आणि बुध्दीमान आहे ①

لَهٗ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۚ يُحْيٖ وَيُمِيْتُ ۚ وَهُوَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ۝٢

आकाश आणि पृथ्वीचे राज्य त्याचेच आहे.[२] तोच जीवन देतो आणि मृत्यु सुध्दा आणि तो सर्व वस्तूवर सामर्थ्यवान आहे. ②

هُوَ الْاَوَّلُ وَالْاٰخِرُ وَالظَّاهِرُ وَالْبَاطِنُ ۚ وَهُوَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ۝٣

तोच पहिल्यापासून आहे आणि तोच शेवटपर्यंत राहील तोच व्यक्त आहे तोच गुप्त[३] आणि तो प्रत्येक वस्तुला चांगल्याप्रकारे जाणणारा आहे. ③

هُوَ الَّذِيْ خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ فِيْ سِتَّةِ اَيَّامٍ ثُمَّ اسْتَوٰى عَلَى الْعَرْشِ ۚ يَعْلَمُ مَا يَلِجُ فِي الْاَرْضِ وَمَا يَخْرُجُ مِنْهَا وَمَا يَنْزِلُ مِنَ السَّمَاءِ وَمَا يَعْرُجُ فِيْهَا ۚ وَهُوَ مَعَكُمْ اَيْنَ مَا كُنْتُمْ ۚ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ۝٤

तो तोच आहे, ज्याने आकाश आणि पृथ्वीला सहा दिवसात निर्माण केले मग महासिंहासनावर विराजमान झाला[४] तो (खूप) जाणतो त्या वस्तुला जी जमिनीत जाईल,[५] आणि जी तिच्यातून निघेल,[६] आणि जी आकाशातून खाली येईल;[७] आणि जे काही चढून त्याच्यात जाईल;[८] आणि जेथे कोठे तुम्ही असाल, तो तुमच्या बरोबर आहे;[९] आणि जे काही तुम्ही करीत आहात अल्लाह् पहात आहे. ④

१) हे पावित्र्य वर्णन, प्रचलित भाषेने नाही, किंबहुना बोली भाषेने आहे म्हणूनच फर्माविण्यात आले आहे, ''तुम्ही त्याचे पावित्र्यवर्णन समजू शकत नाही.'' (सू.बनी इसराईल-४४) ह.दाऊद عليه السلام च्या बाबतीत येते कीं, त्यांच्या बरोबर पर्वत सुध्दाअल्लाह्चे पावित्र्य वर्णन करीत असत. (सू.अंबिया-७९) जर हे पावित्र्यवर्णन प्रचलित भाषेत असते किंवा पावित्र्य वर्णनाचे चिन्ह असते तर ह. दाऊद عليه السلام च्या बरोबर याला खास करण्याची आवश्यकताच नसती.

२) म्हणून तो यांच्यात ज्याप्रमाणे इच्छितो, फेरबदल करतो त्याच्याशिवाय यांच्यात अन्य कोणाचा हुकूम आणि ढवळा-ढवळ चालत नाही. किंवा अर्थ आहे कीं, पाऊस, वनस्पती आणि अन्न संपत्तीचे सर्व खजिने, याच्या मालकीत आहे.

३) तोच प्रथम आहे, म्हणजे त्याच्यापूर्वी काहीच नव्हते तोच शेवटी आहे त्याच्यानंतर कुठलीही वस्तू नाही. तोच उघड आहे, म्हणजे तो सर्वांवर प्रबळ आहे. त्याच्यावर कोणी प्रबळ नाही. तोच गुप्त आहे. म्हणजे गुप्ततेच्या सर्व गोष्टींना फक्त तोच जाणतो. किंवा लोकांच्या दृष्टीतून आणि समजण्यातून तो गुप्त आहे. (फत्हुल कदीर)

४) या भावार्थाचे महावाक्य सू. आअराफ ५४, सू.यूनुस ३, आणि सू.अलीफ लाम-मीम्-सजदः ४, वगैरे महावाक्यात येऊन चुकले आहे त्यांचे समास पाहून घेतले जावेत.

५) म्हणजे जमिनीमध्ये पावसाचे जे थेंब आणि धान्य व फळांचे जे बी दाखल होते. त्यांची संख्या आणि कैफियत ला तो जाणतो.

६) जी झाडे, मग ती फळांची असो किंवा धान्याची, किंवा शोभा आणि सजावटीची आणि सुवासिक फुलांची झुडपे असावी; हे जेवढे पण आणि जसे पण बाहेर निघतात. सर्व अल्लाह्ला ठाऊक आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''आणि अल्लाह्तआलाच्याच जवळ आहे, सर्व गुप्त गोष्टींचे खजिने त्यांना कोणी जाणत नाही, शिवाय अल्लाह्च्या आणि तो सर्व वस्तुंना जाणतो, जे काही जमिनीत आहे, आणि जे काही समुद्रात आहे. आणि कोणी पान पडत नाही, तो त्यालाही जाणतो. आणि कोणी दाणा जमिनीच्या अंधाऱ्या भागात पडत नाही आणि न कोणी ओली आणि न कोणी कोरडी वस्तू पडते. परंतु हे सर्व स्पष्ट पुस्तकात आहे'' (सू.अन्आम -५९)

७) पाऊस, गारा बर्फ, दैव आणि ते आदेश, जे देवदूत घेऊन उतरतात.

८) देवदूत मनुष्यांची जी कर्मे घेऊन चढतात. ज्याप्रमाणे हदीसमध्ये येते कीं, ''अल्लाह्कडे रात्रीची कर्मे, दिवसाच्या पूर्वी, आणि दिवसाची कर्मे रात्रीच्या पूर्वी चढतात.'' (स.मुस्लिम)

९) म्हणजे तुम्ही थळात असा किंवा जळात, रात्र असो अथवा दिवस, घरात असा किंवा वाळवंटात, प्रत्येक ठिकाणी प्रत्येक वेळी, तो आपल्या ज्ञान आणि दृष्टीच्या अनुषंगाने, तुमच्या बरोबर आहे. म्हणजे तुमच्या एक एक कर्माला पाहत आहे. तुमच्या एक एक गोष्टीला जाणतो आणि ऐकतो. हाच विषय, सू.हूद-३, सू.रअद-१० आणि दुसऱ्या महावाक्यामध्ये सुध्दा सांगण्यात आला आहे.

لَهٗ مُلۡكُ السَّمٰوٰتِ وَ الۡاَرۡضِ ؕ وَ اِلَى اللّٰهِ تُرۡجَعُ الۡاُمُوۡرُ ﴿۵﴾

आकाश आणि पृथ्वीचे राज्य त्याचेच आहे; आणि कामे त्याच्याचकडे पोहचविली जातात. (५)

يُوۡلِجُ الَّيۡلَ فِى النَّهَارِ وَ يُوۡلِجُ النَّهَارَ فِى الَّيۡلِ ؕ وَ هُوَ عَلِيۡمٌۢ بِذَاتِ الصُّدُوۡرِ ﴿۶﴾

तोच रात्रीला दिवसात घेऊन जातो, आणि तोच दिवसाला रात्रीत दाखल करून देतो. (१) आणि हृदयाच्या आतील गुप्त गोष्टींना तो पूर्ण जाणणारा आहे. (६)

اٰمِنُوۡا بِاللّٰهِ وَ رَسُوۡلِهٖ وَ اَنۡفِقُوۡا مِمَّا جَعَلَكُمۡ مُّسۡتَخۡلَفِيۡنَ فِيۡهِ ؕ فَالَّذِيۡنَ اٰمَنُوۡا مِنۡكُمۡ وَ اَنۡفَقُوۡا لَهُمۡ اَجۡرٌ كَبِيۡرٌ ﴿۷﴾

अल्लाह्वर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणा; आणि त्या मालातून खर्च करा, ज्यात अल्लाहने तुम्हास वारस बनविले आहे; (२) तर तुमच्यातून जो ईमान आणील आणि दान धर्म करील, त्यांना फार मोठे प्रतिफल मिळेल. (७)

وَ مَا لَكُمۡ لَا تُؤۡمِنُوۡنَ بِاللّٰهِ ۚ وَ الرَّسُوۡلُ يَدۡعُوۡكُمۡ لِتُؤۡمِنُوۡا بِرَبِّكُمۡ وَ قَدۡ اَخَذَ مِيۡثَاقَكُمۡ اِنۡ كُنۡتُمۡ مُّؤۡمِنِيۡنَ ﴿۸﴾

तुम्ही अल्लाहवर ईमान का आणित नाही? वास्तविक स्वत: पैगंबर तुम्हास आपल्या पालनकर्त्यावर ईमान आणण्यासाठी बोलावित आहे; आणि जर तुम्हांस विश्वास असेल तर तो तुमच्या कडून पक्के वचन पण घेऊन चुकला आहे. (३) (८)

هُوَ الَّذِيۡ يُنَزِّلُ عَلٰى عَبۡدِهٖۤ اٰيٰتٍۭ بَيِّنٰتٍ لِّيُخۡرِجَكُمۡ مِّنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوۡرِ ؕ وَ اِنَّ اللّٰهَ بِكُمۡ لَرَءُوۡفٌ رَّحِيۡمٌ ﴿۹﴾

तो (अल्लाह) आहे, जो आपल्या सेवकांवर स्पष्ट स्पष्ट महावाक्ये उतारतो; कारण कीं, त्याने तुम्हास अंध:कारातून काढून प्रकाशाकडे घेऊन जावे; खचित्च अल्लाहतआला तुमच्यावर अति करूणामय आणि दयाळू आहे. (९)

ع ١ ١٠ ١٧ وَ مَا لَكُمۡ اَلَّا تُنۡفِقُوۡا فِيۡ سَبِيۡلِ اللّٰهِ وَ لِلّٰهِ مِيۡرَاثُ السَّمٰوٰتِ وَ الۡاَرۡضِ ؕ لَا يَسۡتَوِيۡ مِنۡكُمۡ مَّنۡ اَنۡفَقَ مِنۡ قَبۡلِ الۡفَتۡحِ وَ قٰتَلَ ؕ اُولٰٓئِكَ اَعۡظَمُ دَرَجَةً مِّنَ الَّذِيۡنَ اَنۡفَقُوۡا مِنۡۢ بَعۡدُ وَ قٰتَلُوۡا ؕ وَ كُلًّا وَّعَدَ اللّٰهُ الۡحُسۡنٰى ؕ وَ اللّٰهُ بِمَا تَعۡمَلُوۡنَ خَبِيۡرٌ ﴿۱۰﴾

तुम्हास काय झाले आहे की तुम्ही अल्लाह्च्या मार्गात खर्च करीत नाही? वास्तविक पाहता आकाश आणि पृथ्वीच्या मिराशीचा मालक (एकटा) अल्लाह्च आहे. तुमच्यातून ज्या लोकांनी (मक्केच्या) विजयापूर्वी अल्लाह्च्या मार्गांत दिले, आणि किताल केले आहे. (ते) दुसऱ्यांच्या बरोबर नाहीत; (४) किंबहुना त्यांच्यापेक्षा फार मोठ्या दर्जाचे आहेत. ज्यांनी विजयानंतर दानधर्म केला आणि जिहाद केलेत. (५) पण होय! भलाईचा वायदा तर अल्लाह्तआलाचा त्या सर्वांशी आहे. (६) जे काही तुम्ही करीत आहात, त्यांच्याशी अल्लाह् माहितगार आहे. (१०) ع १ १० १७

مَنۡ ذَا الَّذِيۡ يُقۡرِضُ اللّٰهَ قَرۡضًا حَسَنًا فَيُضٰعِفَهٗ لَهٗ وَ لَهٗۤ اَجۡرٌ كَرِيۡمٌ ﴿ۚ۱۱﴾

कोणी आहे? जो अल्लाह्तआलाला चांगल्याप्रकारे कर्ज म्हणून देईल; मग अल्लाह्तआला त्याला त्याच्याकरीता वाढवित चालला जाईल. आणि त्याचा आवडता मोबदला सिध्द होऊन जावा. (७) (११)

يَوۡمَ تَرَى الۡمُؤۡمِنِيۡنَ وَ الۡمُؤۡمِنٰتِ يَسۡعٰى نُوۡرُهُمۡ بَيۡنَ اَيۡدِيۡهِمۡ وَ بِاَيۡمَانِهِمۡ بُشۡرٰٮكُمُ الۡيَوۡمَ جَنّٰتٌ تَجۡرِيۡ مِنۡ تَحۡتِهَا الۡاَنۡهٰرُ خٰلِدِيۡنَ فِيۡهَا ؕ ذٰلِكَ هُوَ الۡفَوۡزُ الۡعَظِيۡمُ ﴿ۚ۱۲﴾

कयामतच्या दिवशी तू पाहशील, ईमानवाल्या पुरूष आणि स्त्रियांचा प्रकाश त्यांच्या पुढेपुढे, आणि त्यांच्या उजवीकडे पळत असेल. (८) आज तुम्हास त्या स्वर्गाची खुषखबर आहे, ज्यांच्या खाली पाण्याचे पाट वहात आहेत; ज्यात नित्य रहाणे आहे हे आहे उत्कृष्ट सार्थक! (९) (१२)

१) म्हणजे तमाम वस्तुंचा मालक पण तोच आहे. तो ज्याप्रमाणे इच्छितो, त्यांच्यात फेरबदल करतो. त्याच्याच हुकूम आणि हस्त क्षेपाने, कधी रात्र मोठी आणि दिवस लहान, आणि कधी याच्या उलट, दिवस मोठा आणि रात्र लहान होऊन जाते. आणि कधी दोन्ही समान. अशाचप्रकारे कधी हिवाळा, कधी उन्हाळा, कधी वसंत, कधी शिशीर ऋतूंचा बदल सुध्दा त्याच्याच हुकुमाने आणि मर्जीने होतो.

२) म्हणजे हा माल याच्यापूर्वी कोण्या दुसऱ्याजवळ होता.याच्यात या गोष्टीकडे इशारा आहे कीं, तुमच्या जवळ पण हा माल राहणार नाही, दुसरे त्याचे वारस बनतील. जर तुम्ही त्याला अल्लाह्च्या मार्गांत खर्च केले नाही, तर मागून त्याचे वारस बनणारे त्याला अल्लाह्च्या मार्गांत खर्च करून तुमच्या पेक्षांजास्त भाग्यवान होऊ शकतात. आणि जर

ते त्याला अल्लाह्च्या आज्ञाभंजनात खर्च करतील तर तुम्ही सुध्दा (त्याला) मदत करण्याच्या अपराधात जबाबदार होऊ शकतात. (इब्ने कसीर) हदीस मध्ये येते की, ''मनुष्य म्हणतो माझा माल, माझा माल! वास्तविक तुझा माल, एक तर तो आहे, जो तू खाऊन पिऊन नष्ट करून टाकला दुसरा तो आहे, ज्याला लेऊन जीर्ण करून टाकला आणि तिसरा तो आहे जो अल्लाहच्या मार्गात खर्च करून परलोकांत साठवून ठेवला याच्या शिवाय जे काही आहे, ते सर्व दुसऱ्या लोकांच्या वाट्याला येईल. (स.मुस्लिम)

३) इब्ने कसीर ने 'अखज्' चा फाईल अर्रसूल ला बनविले आहे. आणि अभिप्रेत ते वचन घेतले आहे, जे रसूलुल्लाह् सल्लल्लाहु अलैहि व सल्लम सहाबाकडून घेत असत की, आनंद आणि दु:ख, प्रत्येक स्थितीत ऐकणे आणि पालन करणे आहे. इमाम इब्ने जरीरच्या जवळ याचा फाईल 'अल्लाह्' आहे आणि अभिप्रेत ते वचन आहे, जे अल्लाह्तआने सर्व मनुष्यांपासून त्यावेळी घेतले होते, जेव्हा त्यांना आदमच्या पाठीतून काढले होते. जे 'अहदे अलस्त' म्हणविले जाते. ज्याचा उल्लेख सू. आअ्राफ- १७२ मध्ये आहे.

४) विजयाने अभिप्रेत, बहुतेक भाष्यकारांजवळ मक्केचा विजय आहे. काहींनी हुदैबियाच्या तहाला स्पष्ट विजय समजून त्याला अभिप्रेत घेतले आहे. तथापि हुदैबियाचा तह किंवा मक्केचा विजय याच्यापूर्वी मुसलमान संख्या आणि शक्तीच्या मानाने सुध्दा कमीच होते. आणि मुसलमानांची आर्थिक स्थितीपण फारच दुर्बल होती. या परिस्थितीत अल्लाह्च्या मार्गांत खर्च करणे, आणि जिहादमध्ये भाग घेणे, दोन्ही कामे फारच कठीण आणि मोठ्या हिंमतीची होती. जेव्हा कीं, मक्केच्या विजया नंतर ही परिस्थिती बदलून गेली. मुसलमान शक्ती सामर्थ्यात आणि संख्येत वाढत गेले आणि त्यांची आर्थिक परिस्थिती सुध्दा, पूर्वी पेक्षा किती तरी जास्त उत्तम होऊन गेली. यांच्यात अल्लाह्तआलाने दोन्ही प्रकारच्या मुसलमानांच्या बाबतीत फर्माविले कीं, हे प्रतिफळात समान होऊ शकत नाहीत.

५) कारण की पहिल्याचे अल्लाह्च्या मार्गांत खर्च करणे, आणि जिहाद, दोन्ही कामे फारच कठीण परिस्थितीत झालीत. याने ठाऊक झाले की देणारे आणि देण्याची नियत ठेवणारे यांना दुसऱ्या लोकांच्या तुलनेत प्राधान्य दिले जावे. म्हणूनच अहले सुन्नतच्या जवळ, प्रतिष्ठेत आणि औदार्यांत. ह. अबुबकर सिद्दीक ﷺ सर्वात अग्रेसर आहेत. कारण कीं, सर्व प्रथम ईमानवाले पण तेच आहेत. आणि अल्लाह्च्या मार्गांत खर्च करणारे आणि जिहाद करणारे पण तेच सर्व प्रथम आहे. म्हणूनच रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी, ह. अबुबकर सिद्दीके अकबर ﷺ ला आपल्या जीवनात आणि उपस्थितीत, नमाजी करीता पुढे केले. आणि याच आधारावर ईमानवाल्यांनी (सहाबा ﷺ) त्यांना खिलाफतीसाठी योग्य असण्यला प्राधान्य दिले. रजी अल्लाह् अन्हुम व रजु अनहु.

६) याच्यात खुलासा करून देण्यात आला कीं, सहाबा कराम ﷺ मध्ये प्रतिष्ठा आणि दर्जात फरक तर जरूर आहे; तथापि दर्जातील फरकाचा अर्थ हा नाही कीं, नंतर मुसलमान होणारे सहाबा कराम ﷺ, ईमान आणि चारित्र्याच्या अनुषंगाने फारच नाकारा होते. जसे की काही लोक ह.माविय: ﷺ आणि त्यांचे वडील ह. अबु सुफयान ﷺ आणि दुसरे काही असेच प्रतिष्ठित सहाबांच्या बाबतीत, अशाच निरर्थक (बेहुदा) गोष्टी किंवा त्यांना स्वतंत्र (तुलकाअ्) म्हणून, त्यांची निंदा करतात आणि त्यांना कमी लेखतात. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी तमाम सहाबा करामच्या बाबतीत फर्माविले, ''माझ्या सहाबांना भले बूरे म्हणू नका. शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची ज्याच्या हातात माझे प्राण आहे. की जर तुमच्यातून कोणी मनुष्य अुहद पर्वताएवढे सोने सुध्दां, अल्लाह्च्या मार्गांत खर्च करून टाकील, तर तो माझ्या सहाबीच्या खर्च केलेल्या एक मुद्द किंबहुना अर्ध्या मुद्दच्या पण बरोबर नाही.'' (स.बुखारी व स. मुस्लीम)

७) अल्लाह्ला कर्जे हसना देण्याचा अर्थ आहे. अल्लाह्च्या मार्गात खर्च करणे. हा माल, जो मनुष्य अल्लाहच्या मार्गात खर्च करतो, अल्लाह्चेच दिलेले आहे. असे असून सुध्दा त्याला कर्ज ठरविणे, ही अल्लाहची कृपा आणि उपकार आहे कीं, तो या खर्च करण्यावर अशा प्रकारे बदला देईल कीं, ज्याप्रमाणे कर्ज फेडणे आवश्यक असते.

८) हे हशर च्या काळात पुलसिरातमध्यें होईल. हा प्रकाश, त्यांच्या ईमान आणि सुकृत्यांचा बदला असेल ज्याच्या प्रकाशात ते स्वर्गाचा मार्ग सहजतेने पार करून घेतील. इमाम इब्ने कसीर आणि इमाम इब्ने जरीर वगैरेंनी व बि अय्मानिहिम्चा भावार्थ हा सांगितला आहे कीं, त्यांच्या उजव्या हातात त्यांची कर्मे पत्रे असतील.

९) हे ते देवदूत म्हणतील,जे त्यांच्या स्वागत आणि मार्गदर्शनासाठी तेथे असतील.

يَوْمَ يَقُوْلُ الْمُنٰفِقُوْنَ وَالْمُنٰفِقٰتُ لِلَّذِيْنَ اٰمَنُوا انْظُرُوْنَا نَقْتَبِسْ مِنْ نُّوْرِكُمْ ۚ قِيْلَ ارْجِعُوْا وَرَآءَكُمْ فَالْتَمِسُوْا نُوْرًا ؕ فَضُرِبَ بَيْنَهُمْ بِسُوْرٍ لَّهٗ بَابٌ ؕ بَاطِنُهٗ فِيْهِ الرَّحْمَةُ وَظَاهِرُهٗ مِنْ قِبَلِهِ الْعَذَابُ ؕ﴿١٣﴾

त्या दिवशी, दांभिक पुरूष आणि स्त्रिया ईमानवाल्यांना म्हणतील की, आमची वाट तर पहा कीं आम्ही सुध्दा तुमच्या प्रकाशांतून काही प्रकाश मिळवून घ्यावा; (१) उत्तर दिले जाईल की तुम्ही आपल्या मागे परतून जा; (२) आणि प्रकाश शोधा. मग त्यांच्या दर्म्यान (३) एक भिंत उभी केली जाईल, आणि तिच्यात एक दरवाजा पण असेल; तिच्या आतील भागात तर रहमत असेल (४) आणि बाहेरच्या बाजूला शिक्षा असेल. (५) १३

يُنَادُوْنَهُمْ اَلَمْ نَكُنْ مَّعَكُمْ ؕ قَالُوْا بَلٰى وَلٰكِنَّكُمْ فَتَنْتُمْ اَنْفُسَكُمْ وَتَرَبَّصْتُمْ وَارْتَبْتُمْ وَغَرَّتْكُمُ الْاَمَانِيُّ حَتّٰى جَآءَ اَمْرُ اللّٰهِ وَغَرَّكُمْ بِاللّٰهِ الْغَرُوْرُ ﴿١٤﴾

हे ओरडून ओरडून त्यांना म्हणतील, की काय आम्ही तुमच्या बरोबर नव्हतो? (६) ते म्हणतील होय! होता तर खरे! परंतु तुम्ही आपणच आपल्याला मार्गभ्रष्टतेत फसवून ठेवले होते. (७) आणि वाटच पाहत राहिलात; (८) आणि संशयात पडून राहिलात. (९) आणि तुम्हास तुमच्या निरर्थक आकांक्षांनी फसगतीतच (१०) ठेवले; येथ पावेतो की, अल्लाह्चा हुकूम येऊन पोहचला; (११) आणि तुम्हास अल्लाह्च्या बाबतीत धोका देणाऱ्याने धोक्यांतच ठेवले. (१२) १४

فَالْيَوْمَ لَا يُؤْخَذُ مِنْكُمْ فِدْيَةٌ وَّلَا مِنَ الَّذِيْنَ كَفَرُوْا ؕ مَاْوٰىكُمُ النَّارُ ؕ هِيَ مَوْلٰىكُمْ ؕ وَبِئْسَ الْمَصِيْرُ ﴿١٥﴾

तर आज तुमच्याकडून न काही प्राणमूल्य (आणि न बदला) मान्य केला जाईल. आणि न काफिरांपासून. तुम्हा सर्वांचे ठिकाण नरकाग्नी आहे. तोच तुमचा सोबती आहे. (१३) आणि ते (फारच) वाईट ठिकाण आहे. १५

اَلَمْ يَاْنِ لِلَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اَنْ تَخْشَعَ قُلُوْبُهُمْ لِذِكْرِ اللّٰهِ وَمَا نَزَلَ مِنَ الْحَقِّ ۙ وَلَا يَكُوْنُوْا كَالَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ مِنْ قَبْلُ فَطَالَ عَلَيْهِمُ الْاَمَدُ فَقَسَتْ قُلُوْبُهُمْ ؕ وَكَثِيْرٌ مِّنْهُمْ فٰسِقُوْنَ ﴿١٦﴾

काय आतापर्यंत ईमानवाल्याकरीता वेळ आला नाही की त्यांची अंत:करणे अल्लाह्च्या स्मरणाकडून आणि सत्य जे उतरून चुकले आहे, त्याच्याने नरम होऊन जावीत? (१४) आणि त्यांच्याप्रमाणे न होऊन जावे, ज्यांना यांच्यापूर्वी पुस्तक दिले गेले होते. (१५) मग जेव्हा त्यांच्यावर एक लांबलचक मुदत लोटली, तर त्यांची अंत:करणे कठीण होऊन गेलीत (१६) आणि त्यांच्यातून बहुतेक आज्ञाभंजक आहेत (१७) १६

اِعْلَمُوْٓا اَنَّ اللّٰهَ يُحْيِ الْاَرْضَ بَعْدَ مَوْتِهَا ؕ قَدْ بَيَّنَّا لَكُمُ الْاٰيٰتِ لَعَلَّكُمْ تَعْقِلُوْنَ ﴿١٧﴾

जाणून असा की, अल्लाह्चं जमिनीला तिच्या मृत झाल्या पश्चात्य जिवंत करून देतो. आम्ही तुमच्या करीता आमच्या निशाण्या स्पष्ट करून सांगितल्या आहेत की कदाचित् तुम्ही समजाल १७

اِنَّ الْمُصَّدِّقِيْنَ وَالْمُصَّدِّقٰتِ وَاَقْرَضُوا اللّٰهَ قَرْضًا حَسَنًا يُّضٰعَفُ لَهُمْ وَلَهُمْ اَجْرٌ كَرِيْمٌ ﴿١٨﴾

नि:संशय दानधर्म करणारे पुरूष आणि स्त्रिया, आणि जे अल्लाह्ला दिलखुषीने कर्ज देत आहेत. त्यांच्याकरीता हे वाढविले जाईल. (१८) आणि त्यांच्याकरीता आवडते प्रतिफल आणि मोबदला आहे. (१९) १८

وَالَّذِيْنَ اٰمَنُوْا بِاللّٰهِ وَرُسُلِهٖٓ اُولٰٓئِكَ هُمُ الصِّدِّيْقُوْنَ ۖ وَالشُّهَدَآءُ عِنْدَ رَبِّهِمْ ؕ لَهُمْ اَجْرُهُمْ وَنُوْرُهُمْ ؕ وَالَّذِيْنَ كَفَرُوْا وَكَذَّبُوْا بِاٰيٰتِنَآ اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ الْجَحِيْمِ ﴿١٩﴾ ع ٢ / ١٨

अल्लाह् आणि त्याच्या पैगंबरावर जे ईमान आणतात, तेच लोक आपल्या पालनकर्त्या समिप, सात्विक (२०) आणि हुतात्मे आहेत. त्याच्याकरिता त्याचे प्रतिफळ, आणि त्यांचा प्रकाश आहे. आणि जे कुफ्र करतात आणि आमच्या निशाण्यांना खोटे ठरवतात, तेच नर्कवासी आहेत. १९

१) हे ढांभिक लोक काही अंतरापर्यंत, ईमानवाल्या बरोबर त्यांच्या प्रकाशात चालतील मग अल्लाहृतआला ढांभिकावर अंधार लादून देईल त्यावेळी ते मुसलमानांना हे म्हणतील.

२) याचा अर्थ हा आहे कीं, जगात जाऊन, अशाच प्रकारे ईमान आणि सुकृत्यांची पुंजी घेऊन या ज्याप्रमाणे आम्ही आणली आहे. किंवा उपहास म्हणून ईमानवाले म्हणतील कीं मागे जा, जेथून तुम्ही हा प्रकाश आणला होता, तेथेच जाऊन त्याचा शोध करा.

३) म्हणजे ईमानवाले आणि ढांभिक यांच्या ढर्म्यान.

४) याच्याने अभिप्रेत स्वर्ग आहे. ज्यात ईमानवाले ढाखल होऊन चुकले असतील.

५) हा तो हिस्सा आहे, ज्यात नर्काग्नी असेल.
६) म्हणजे भिंत आडवी आल्यावर, दांभिक, मुसलमानांना म्हणतील की, जगात आम्ही तुमच्याबरोबर नमाजी पढत नव्हतो. आणि जिहाद वगैरे मध्ये भाग घेत नव्हतो ?
७) की तुम्ही आपल्या मनात कुफ्र आणि निफाकला लपवून ठेवले होते.
८) की कदाचित् मुसलमान कोण्या कालचक्राच्या फेऱ्यात सापडून जावेत.
९) धर्माच्या बाबतीत, म्हणूनच न कुरआनाला मानले न प्रमाण व चमत्कारांना.
१०) ज्यात शैतानाने तुम्हास व्यस्त करून ठेवले.
११) म्हणजे तुम्हास मृत्यू आला, किंवा मुसलमान सरशेवटी प्रबळ राहिले आणि तुमच्या आकांक्षावर पाणी फिरून गेले.
१२) म्हणजे अल्लाहची करूणा, आणि त्याच्या सवलत देण्याच्या कायद्यामुळे तुम्हास शैतानाने धोक्यात टाकून ठेवले.
१३) मौला त्याला म्हणतात, जो कोणाच्या कामांचा व्यवस्थापक म्हणजे जबाबदार बनेल. जणूआता नरकाग्नीच या गोष्टीला जबाबदार आहे की, त्यांना कठीणात कठीण शिक्षेची गोडी चाखवावी. काही म्हणतात की नेहमी बरोबर रहाणाऱ्यालाही मौला म्हणवून घेता. म्हणजे आता नर्काची आगच त्यांची नेहमीची साथी आणि सोबती होईल. काही म्हणतात कीं अल्लाहतआला नरकाग्नीला सुध्दा बुध्दी आणि समज बहाल करील तर ती काफिरांच्या विरूध्द प्रकोफ आणि रागाला जाहीर करेल. म्हणजे त्याची वाली बनेल, आणि त्यांना दु:खदाय शिक्षेत ग्रस्त करेल.
१४) ईमानवाल्यांना संबोधित आहे. आणि उद्देश्य त्यांना अल्लाहच्या स्मरणाकडे आणखी लक्ष देणे आणि कुरआन करीम पासून हिदायत घेण्याची ताकीद करणे आहे. खुशुअ चा अर्थ आहे, अंत:करण नरम होऊन अल्लाहकडे झुकून जाणे. सत्याने अभिप्रेत कुरआन करीम आहे.
१५) जसे यहूदी आणि ख्रिस्ती आहेत. म्हणजे तुम्ही त्यांच्या सारखे न होऊन जावे.
१६) तात्पर्य, त्यांनी अल्लाहच्या पुस्तकामध्ये हेर फेर आणि बदल करून टाकला. याच्या मोबदल्यात, दुनियाचे क्षणिक फायदे मिळवण्याची त्यांनी आपली पध्दत बनवून घेतली. त्याच्या आदेशांना पाठीमागे टाकून दिले. अल्लाहच्या धर्मांत लोकांचे अनुकरण करून घेतले आणि त्यांना आपला पालनकर्ता बनवून घेतले. मुसलमानांना तंबी करण्यात येत आहे की तुम्ही हे काम करू नका. नाही तर तुमची अंत:करणे पण कठीण होऊन जातील आणि मग हीच कामे जी त्यांच्यावर अल्लाहच्या शापाला कारणीभूत झालीत, तुम्हास चांगली वाटतील.
१७) म्हणजे त्यांची अंत:करणे खराब झालेली आणि कर्मे निरर्थक आहेत. दुसऱ्या ठिकाणी अल्लाहने फर्माविले, ''मग त्यांच्या वचनभंगामुळे आम्ही त्यांच्यावर आपला शाप टाकून दिला; आणि त्यांची अंत:करणे कठीण करून टाकली की ते अल्लाहच्या वाणीला त्याच्या जागेवरून बदलून टाकतात. आणि जो काही उपदेश त्यांना केला गेला होता, त्याचा फार मोठा भाग विसरून गेलेत. (सू.माईद. १३)
१८) म्हणजे एकाच्या बदल्यात कमीत कमी दहापट,आणि याच्यापेक्षा जास्त सातशे पट किंबहुना याच्यापेक्षा सुध्दा जास्त पर्यंत ही अधिकता नियतची प्रांजलता, इच्छा व आवश्यकता आणि रहाण्याचे ठिकाण आणि काळ, यांच्या आधारावर होऊ शकते. जसे पहिले येऊन चुकले कीं, ज्या लोकांनी मक्केच्या विजयापूर्वी खर्च केला, ते पुण्यप्रतिफळामध्ये, त्यांच्यापेक्षा जास्त असतील, ज्यांनी याच्यानंतर खर्च केला.
१९) म्हणजे स्वर्ग आणि त्याच्या देणग्या, ज्यांना कधी ऱ्हास आणि नष्ट होणे नाही.
२०) सिद्दीकियत (सत्यपणा) पूर्ण ईमान आणि पूर्ण सत्य व पावित्र्याचे नाव आहे. हदीसमध्ये येते कीं, ''मनुष्य नेहमी सत्य बोलतो आणि सत्याच्या शोधात आणि सत्याच्या प्रयत्नात राहतो. येथ पावेतो कीं, अल्लाहच्या तेथे त्याला 'सिद्दीक' लिहून दिले जाते (मुत्तफिकून अलैहि) एका आणखी हदीसमध्ये सिद्दीकीन (सत्यवादीचे) ते स्थान सांगण्यात आले आहे, जे स्वर्गांत त्यांना प्राप्त होईल फर्माविले, ''स्वर्गवासी आपल्या वरच्या महालातील लोकांना अशाप्रकारे पाहतील, जसे चमकणाऱ्या पूर्वीय आणि पश्चिमी ताऱ्यांना तुम्ही आकाशाच्या किनाऱ्यावर पाहतात. म्हणजे त्यांच्या दर्म्यान दर्जांचा एवढा फरक राहील. सहाबांनी विचारले, हे पैगंबरांचे दर्जे असतील, ज्यांना दुसरे प्राप्त करू शकणार नाही? आपण ﷺ नी. फर्माविले, '' होय! शपथ आहे त्या व्यक्तीत्वाची, ज्याच्या हातात माझे प्राण आहेत, हे ते लोक आहेत, ज्यांनी अल्लाहवर ईमान आणले आणि पैगंबरांना खरे जाणले.'' (स.बुखारी) म्हणजे ईमान आणि मान्य करण्याचा हक्क अदा केला. (फतहुल बारी)

اِعۡلَمُوۡۤا اَنَّمَا الۡحَيٰوةُ الدُّنۡيَا لَعِبٌ وَّ لَهۡوٌ وَّ زِيۡنَةٌ وَّتَفَاخُرٌۢ بَيۡنَكُمۡ وَتَكَاثُرٌ فِى الۡاَمۡوَالِ وَالۡاَوۡلَادِ ؕ كَمَثَلِ غَيۡثٍ اَعۡجَبَ الۡكُفَّارَ نَبَاتُهٗ ثُمَّ يَهِيۡجُ فَتَرٰىهُ مُصۡفَرًّا ثُمَّ يَكُوۡنُ حُطٰمًا ؕ وَفِى الۡاٰخِرَةِ عَذَابٌ شَدِيۡدٌ ۙ وَّمَغۡفِرَةٌ مِّنَ اللّٰهِ وَرِضۡوَانٌ ؕ وَمَا الۡحَيٰوةُ الدُّنۡيَاۤ اِلَّا مَتَاعُ الۡغُرُوۡرِ ﴿٢٠﴾

**जाणून असा की इहलौकिक आयुष्य फक्त खेळ तमाशा, थाटमाट, आणि आपसात अहंकार आणि शेखी, आणि धनसंपत्ती आणि संततीत, एकाचे दुसऱ्यावर, आपल्या स्वत:ला वरचढ दाखविणे आहे. जसे पाऊस आणि त्याची पिके शेतकऱ्याला [१] चांगली वाटतात. परंतु जेव्हा ती वाळून जातात, तेव्हा पिवळा रंग दाखवू लागतात. मग ती एकदम चुरा चुरा होऊन जातात. [२] आणि परलोकात कडक शिक्षा [३] आहेत. आणि अल्लाह्चे क्षमादान आणि त्याची सुप्रसन्नता आहे. [४] आणि इहलौकिक आयुष्य फसगतीच्या साधनांशिवाय आणखी काही सुध्दा तर नाही. [५] ⑳**

سَابِقُوۡۤا اِلٰى مَغۡفِرَةٍ مِّنۡ رَّبِّكُمۡ وَجَنَّةٍ عَرۡضُهَا كَعَرۡضِ السَّمَآءِ وَالۡاَرۡضِ ۙ اُعِدَّتۡ لِلَّذِيۡنَ اٰمَنُوۡا بِاللّٰهِ وَرُسُلِهٖ ؕ ذٰلِكَ فَضۡلُ اللّٰهِ يُؤۡتِيۡهِ مَنۡ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ ذُو الۡفَضۡلِ الۡعَظِيۡمِ ﴿٢١﴾

**(या!) पळा, आपल्या पालनकर्त्याच्या क्षमेकडे; [६] आणि त्या स्वर्गाकडे कीं ज्याचा विस्तार आकाश व पृथ्वीच्या विस्तारा एवढा आहे. [७] हा त्याच्यासाठी बनविण्यात आला आहे, जे अल्लाह्वर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान ठेवतात. ही अल्लाह्ची कृपा आहे, ज्याला इच्छील त्याला देईल. [८] आणि अल्लाह् हा महाकृपानिधान आहे. [९] ㉑**

مَاۤ اَصَابَ مِنۡ مُّصِيۡبَةٍ فِى الۡاَرۡضِ وَلَا فِىۡۤ اَنۡفُسِكُمۡ اِلَّا فِىۡ كِتٰبٍ مِّنۡ قَبۡلِ اَنۡ نَّبۡرَاَهَا ؕ اِنَّ ذٰلِكَ عَلَى اللّٰهِ يَسِيۡرٌ ۚ ﴿٢٢﴾

**न कोणी संकट जगात येते, [१०] न तुमच्या जिवावर, [११] परंतु याच्यापूर्वी की आम्ही त्याला निर्माण करू. ती एका खास पुस्तकात लिहिलेली आहेत. [१२] हे (काम) अल्लाहृतआलासाठी (फारच) सोपे आहे. ㉒**

१) काफिर, शेतकऱ्यांना म्हणण्यात आले आहे. या साठी की याचा शब्दकोषीय अर्थ आहे, लपविणारे. काफिरांच्या मनात अल्लाह्च्या आणि परलोकाचा इन्कार लपलेला असतो. म्हणून त्यांना काफिर म्हणण्यात येते आणि शेतकऱ्यांसाठी हा शब्द यासाठी बोलण्यात आला आहे कीं, ते पण जमिनीत बी पेरतात, म्हणजे त्याला लपवून देतात.

२) येथे ऐहिक जीवनाला उतरती कळा आहे. शेतीने उपमा दिली गेली आहे की, जेव्हा शेती लसलसू लागते तेव्हा फारच चांगली वाटते. शेतकरी तिला पाहून फारच आनंदित होतात; परंतु ती लवकरच कोरडी पडून आणि पिवळी होऊन चुरा चुरा होऊन जाते. अशाच प्रकारे दुनियेचा थाटमाट, धनसंपत्ती आणि संतती आणि दुसऱ्या गोष्टी मनुष्याचे मन लुभवितात. परंतु हे जीवन थोड्याच दिवसांचे आहे; तिलाही टिकाव आणि स्थैर्य नाही.

३) म्हणजे कुफ्रवाले आणि गुन्हेगार याच्या करीता, जे दुनियेच्या खेळ तमाशातच गर्क राहिले आणि यालाच त्यांनी जीवनाचे ध्येय समजले.

४) म्हणजे ईमानवाले आणि आज्ञापालन करणारे यांच्या करीता, ज्यांनी या दुनियेलाच सर्व काही समजले नाही. किंबहुना इला, तात्पुरती, नष्ट होणारी, आणि परीक्षेचे ठिकाण समजत, अल्लाह्च्या मार्गदर्शनानुसार, इच्यात जीवन घालविले.

५) परंतु त्याच्या करीता जो तिच्या फसवणूकीत ग्रस्त राहिला; आणि परलोकासाठी काहीच केले नाही. परंतु ज्याने या इहलौकिक जीवनाला, परलोक मिळविण्याकरीता, उपयोगात आणले तर त्याच्याकरीता हीच दुनिया याच्यापेक्षा उत्तम जीवन प्राप्त करण्याचे साधन सिध्द होईल.

६) म्हणजे चांगली कर्मे आणि खऱ्या मनाने केलेल्या तौबा कडे कारण याच गोष्टी पालनकर्त्याच्या क्षमेची साधने आहेत.

७) आणि ज्याची रूंदी एवढी असेल, त्याची लांबी किती असेल? कारण की लांबी, रूंदी पेक्षा जास्तच असते.

८) उघड आहे. इची वाच्छा त्याच्याच करीता असते, जो कुफ्र आणि पापाकडून तौबा करून ईमान आणि चांगल्या कामांचे जीवन अंगिकारून घेतो. म्हणून तो अशा लोकांना ईमान आणि चांगल्या कामांची सुबुध्दी पण बहाल करून देतो.

९) तो ज्यावर इच्छितो, आपली कृपा करतो. ज्याला तो काही देईल, त्याला कोणी रोकू शकत नाही. आणि ज्यापासून रोकून देईल, त्याला कोणी देऊं शकत नाही. सर्व भलाई त्याच्याच हातात आहे. आणि तोच कृपा करणारा आणि वास्तविक क्षमाकर्ता आहे. ज्याच्याजवळ कृपणतेची कल्पनाच नाही.

१०) उदाहरणार्थ दुष्काळ, महापूर आणि दुसऱ्या आपत्ती पृथ्वीवरील आणि आकाशातील.

११) उदाहरणार्थ आजार, दु:ख थकणे आणि तंगी वगैरे.

१२) म्हणजे अल्लाह्ने आपल्या ज्ञानाप्रमाणे, सर्व सृष्टीच्या निर्मितीच्या पूर्वीच या सर्व गोष्टी लिहून ठेवल्या आहेत जसे हदीसमध्ये आहे, नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''अल्लाह्तआलाने आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीच्या पन्नास हजार वर्षापूर्वी सर्व दैवे (तकदीरे) लिहून दिली होती.'' (स. मुस्लीम)

لِّكَيْلَا تَأْسَوْا عَلَىٰ مَا فَاتَكُمْ وَلَا تَفْرَحُوا بِمَا آتَاكُمْ ۗ وَاللَّهُ لَا يُحِبُّ كُلَّ مُخْتَالٍ فَخُورٍ ﴿٢٣﴾

यासाठी कीं तुम्ही आपल्यापासून कोणतीही वस्तू हातून निघून जाईल, तर त्यावर दु:खी होऊ नका आणि मिळालेल्या वस्तुंवर ऐट दाखवू नका [१] आणि ऐट दाखविण्याऱ्यास, शेखी मिरविण्याऱ्यास, अल्लाह् पसंत करीत नाही. (२३)

الَّذِينَ يَبْخَلُونَ وَيَأْمُرُونَ النَّاسَ بِالْبُخْلِ ۗ وَمَن يَتَوَلَّ فَإِنَّ اللَّهَ هُوَ الْغَنِيُّ الْحَمِيدُ ﴿٢٤﴾

जे (स्वत: पण) कृपणपणा करतात. आणि दुसऱ्यांना पण कृपणपणाची शिकवण देतात. ऐका! जो कोणी तोंड फिरवून घेईल, [२] (तर) अल्लाह् निरपेक्ष आणि स्तुतिस पात्र आहे. (२४)

لَقَدْ أَرْسَلْنَا رُسُلَنَا بِالْبَيِّنَاتِ وَأَنزَلْنَا مَعَهُمُ الْكِتَابَ وَالْمِيزَانَ لِيَقُومَ النَّاسُ بِالْقِسْطِ ۖ وَأَنزَلْنَا الْحَدِيدَ فِيهِ بَأْسٌ شَدِيدٌ وَمَنَافِعُ لِلنَّاسِ وَلِيَعْلَمَ اللَّهُ مَن يَنصُرُهُ وَرُسُلَهُ بِالْغَيْبِ ۚ إِنَّ اللَّهَ قَوِيٌّ عَزِيزٌ ﴿٢٥﴾

खरोखर आम्ही आपल्या पैगंबरांना खुले खुले प्रमाण देऊन पाठविले आणि त्याच्या बरोबर पुस्तक आणि न्याय अवतरीत केला. [३] कारण की लोकांनी न्यायावर कायम रहावे. आणि आम्ही लोखंडाला [४] उतारले की ज्यात फार सक्त धाक आहे. [५] आणि लोकांकरिता आणखीही पुष्कळसे फायदे आहेत [६] यासाठी कीं, अल्लाह्ने जाणून घ्यावे की त्याची आणि त्याच्या पैगंबराची मदत पाहिल्या शिवाय कोण करतो? [७] नि:संशय अल्लाह् बलवान आणि परम समर्थ आहे. [८] (२५)

وَلَقَدْ أَرْسَلْنَا نُوحًا وَإِبْرَاهِيمَ وَجَعَلْنَا فِي ذُرِّيَّتِهِمَا النُّبُوَّةَ وَالْكِتَابَ ۖ فَمِنْهُم مُّهْتَدٍ ۖ وَكَثِيرٌ مِّنْهُمْ فَاسِقُونَ ﴿٢٦﴾

नि:संशय आम्ही नूह आणि इब्राहीमला (पैगंबर बनवून) पाठविले ; आणि आम्ही उभयतांच्या संततीत पैगंबरी आणि पुस्तके चालू ठेवली तथापि त्याच्यातून काही सन्मार्गोन्मुख झाले आणि त्याच्यातून बहुतेक आज्ञाभंजकच राहिलेत. (२६)

१) येथे ज्या आनंद आणि दु:खाने मना करण्यात आले आहे. ती खुषी आणि दु:ख आहे, जी मनुष्याला अयोग्य कामांपर्यत पोहचवून देतात. नाही तर त्रासामुळे दु:खीत होणे, आणि आरामाने आनंदित होणे, हे एक स्वाभाविक कर्म आहे. परंतु ईमानवाला त्रासात सहनशिलता पत्करतो की ही अल्लाह्ची मर्जी आणि दैव आहे. हाय हाय करण्याने याच्यात बदल होऊ शकत नाही. आणि सुखचैनीत ऐट दाखवित नाही. तर अल्लाह्चे आभार मानतो की हा फक्त त्याच्या प्रयत्नांचा परिणाम नाही; किंबहुना अल्लाह्ची कृपा आणि त्याचा उपकार आहे.

२) म्हणजे अल्लाह्च्या मार्गांत खर्च करण्याने; कारण की खरा कृपणपणा हाच आहे.

३) मिजान अभिप्रेत न्याय आहे. आणि अर्थ आहे कीं आम्ही लोकांना न्याय करण्याचा हुकूम दिला आहे. काहींनी याचे भाषांतर तराजू केले आहे. तराजूच्या उतारण्याचा अर्थ आहे, आम्ही लोकांना तराजूकडे मार्गदर्शन केले की हिच्या मार्फत तोलून लोकांना पुरा पुरा हक्क द्या.

४) येथे पण उतारणे, निर्माण करणे आणि त्याची कारागिरी शि कवणे या अर्थात आहे. लोखंडापासून असंख्य वस्तू बनतात. हा सर्व अल्लाह्च्या मनात टाकण्याचा आणि फर्मानाचा परीणाम आहे. जे त्याने माणसाला शिकविला आहे.

५) म्हणजे लोखंडापासून युध्दाची हत्यारे बनतात. जसे तलवारी, भाला, बंदूक, जहाजे, पाणबुड्या, गज्स, रॉकेट आणि टँक वगैरे असंख्य वस्तू ज्याच्याने शत्रुवर वार पण केला जातो, आणि आपले संरक्षण सुध्दा.

६) म्हणजे युध्द विषयक साहित्याशिवाय, लोखंडापासून आणखी पण बऱ्याच वस्तू बनतात. ज्या घरामध्ये आणि वेगवेगळ्या कारागिरीमध्ये कामास येतात. जसे सुऱ्या, चाकू, छीनी, हतोडा, सुई, शेती, सुतार काम आणि इमारती वगैरेचा सामान आणि लहान मोठ्या बेशुमार मशीनी आणि साज व सामान.

७) म्हणजे पैगंबरांना यासाठी पण पाठविले आहे. कारण त्यांनी जाणून घ्यावे की कोण त्याच्या पैगंबरावर, अल्लाह्ला पाहिल्या शिवाय, ईमान आणतो आणि त्यांची मदत करतो.

८) त्याला या गोष्टीची इच्छा नाही कीं लोकांनी त्याच्या धर्माची आणि त्याच्या पैगंबरांची मदत करावी, किंबहुना तो इच्छील तर यांच्या शिवायच त्यांच्या वरचढ करून देईल. लोकांनातर त्यांची मदत करण्याचा हुकूम, त्यांच्या आपल्याच भल्यासाठी दिला गेला आहे. कारण कीं अशा प्रकारे ते आपल्या अल्लाह्ला प्रसन्न करून, त्याच्या क्षमेला आणि दयेला पात्र होऊन जावेत.

ثُمَّ قَفَّيْنَا عَلٰٓى اٰثَارِهِمْ بِرُسُلِنَا وَقَفَّيْنَا بِعِيْسَى ابْنِ مَرْيَمَ وَاٰتَيْنٰهُ الْاِنْجِيْلَ ۙ وَجَعَلْنَا فِيْ قُلُوْبِ الَّذِيْنَ اتَّبَعُوْهُ رَاْفَةً وَّرَحْمَةً ۭ وَرَهْبَانِيَّةَ ابْتَدَعُوْهَا مَا كَتَبْنٰهَا عَلَيْهِمْ اِلَّا ابْتِغَاۗءَ رِضْوَانِ اللّٰهِ فَمَا رَعَوْهَا حَقَّ رِعَايَتِهَا ۚ فَاٰتَيْنَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا مِنْهُمْ اَجْرَهُمْ ۚ وَكَثِيْرٌ مِّنْهُمْ فٰسِقُوْنَ ﴿٢٧﴾

याच्यानंतर तरी सुध्दा आम्ही पदोपदी आमच्या पैगंबरास पाठवित राहिलो. आणि याच्यानंतर ईसा इब्ने मर्यमला पाठविले. आणि त्यांना 'इंजील' प्रदान केले; आणि त्यांच्या मानणाऱ्यांच्या अंत:करणात करूणा आणि दया निर्माण करून दिली. [१] होय! संन्यास (दुनियेला तर्क करणे) तर त्या लोकांनी स्वत: शोधून काढला होता; [२] आम्ही त्याच्यावर याला कर्तव्य ठरवले नव्हते. [३] परंतु अल्लाह्ची मर्जी संपादण्याकरीता [४] (त्यांनी याला काढले होते) परंतु त्यांनी याचे पुरेपूर पालन केले नाही. [५] तरी सुध्दा आम्ही त्याच्यातून ज्या लोकांनी ईमान आणले होते, त्यास आम्ही मोबदला [६] दिला; आणि त्याच्यातून बहुतेक लोक आज्ञाभंजक आहेत. ﴿२७﴾

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوا اتَّقُوا اللّٰهَ وَاٰمِنُوْا بِرَسُوْلِهٖ يُؤْتِكُمْ كِفْلَيْنِ مِنْ رَّحْمَتِهٖ وَيَجْعَلْ لَّكُمْ نُوْرًا تَمْشُوْنَ بِهٖ وَيَغْفِرْ لَكُمْ ۭ وَاللّٰهُ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿٢٨﴾

अहो त्या लोकांनो! ज्यांनी ईमान आणले आहे, अल्लाहला भित रहा. आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणा. अल्लाह् तुम्हास त्याच्या दयेतून दुप्पट हिस्सा देईल. [७] आणि तुम्हास प्रकाश देईल, ज्याच्या प्रकाशात तुम्ही चालाल फिराल, आणि तुमची पापे पण क्षमा करून टाकील. आणि अल्लाह् क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ﴿२८﴾

لِّئَلَّا يَعْلَمَ اَهْلُ الْكِتٰبِ اَلَّا يَقْدِرُوْنَ عَلٰي شَيْءٍ مِّنْ فَضْلِ اللّٰهِ وَاَنَّ الْفَضْلَ بِيَدِ اللّٰهِ يُؤْتِيْهِ مَنْ يَّشَاۗءُ ۭ وَاللّٰهُ ذُو الْفَضْلِ الْعَظِيْمِ ﴿٢٩﴾

हे यासाठी की ग्रंथधारी लोकांनी जाणून घ्यावे की, अल्लाह्च्या कृपेच्या कोण्या हिश्यावर सुध्दा त्यांना (काही) अधिकार नाही; आणि हे की, (सर्व) कृपा अल्लाह्च्याच हाती आहे, तो ज्याला इच्छील (त्याला) देईल. आणि अल्लाह् मोठाच कृपानिधान आहे. ﴿२९﴾

१) 'रअ्फतून' चा अर्थ करूणा आणि रहमतचा अर्थ दया आहे. अनुयायींनी अभिप्रेत ह. ईसा عليه السلام चे हवारी आहेत. यांच्या मनात एक दुसऱ्या बद्दल प्रीतीच्या भावना निर्माण करून दिल्या जसे सहाबा किराम رضي الله عنهم एक दुसऱ्या करता दयाळू आणि करूणाशिल होते. 'रूहमाऊ बय्‌न हुम्'' यहूदी आपसात एक दुसऱ्याचे अशाप्रकारे सहानुभूती बाळगणारे नव्हते. जसे, ह. ईसा عليه السلام चे अनुयायी होते.

२) रहबानिय्‌तचा भावार्थ आहे. इहलोकाला तर्क करणे. म्हणजे दुनिया आणि दुनियाचे झमेले यांना सोडून देऊन कोण्या जंगलांत, निर्जन जागी जाऊन, अल्लाह्ची उपासना करणे, याची पार्श्वभूमी ही आहे. कीं, ह. ईसा عليه السلام नंतर असे बादशाह झालेत, ज्यांनी तौरात आणि इंजील मध्ये फेरबदल करून दिला; ज्याला एका समूहाने मान्य केले नाही त्यांनी बादशाहच्या भीतीने पर्वत आणि गुफांमध्ये, आश्रय घेतला ही याची सुरवात होती. ज्याचा आधार असहय्यता आणि बेचैनी होती. परंतु यांच्यानंतर येणाऱ्या पुष्कळशा लोकांनी आपल्या बुजुर्गांच्या आंधळ्या अनुकरणात हे शहराला सोडून जाण्याला उपासनेची एक पध्दत बनवून घेतली आणि आपल्या स्वत:ला चर्च मध्ये आणि उपासना गृहात बंदिस्त करून घेतले. आणि याच्याकरीता दुनियाकडून संबंध तोडून घेण्याला आवश्यक ठरवून घेण्यात आले यालाच अल्लाह्ने स्वत:च घडवून घेणे असे संबोधित केले आहे. (इब्तदाअ)

३) ही मागील गोष्टीचीच ताकीद आहे कीं हा संन्यास घेणे हा यांचा स्वत:चा शोध होता. अल्लाहने याचा हुकूम दिला नव्हता.

४) म्हणजे आम्ही तर यांच्यावर आपली प्रसन्नता पाहणे हेच कर्तव्य केले होते. दुसरे भाषांतर याचे आहे की, त्यांनी हे काम अल्लाह्च्या प्रसन्नतेचा शोध घेण्यासाठी केले होते. परंतु अल्लाह्तआलाने खुलासा करून दिला की अल्लाह्ची सुप्रसन्नता, धर्मात आपल्याकडून नवीन गोष्टी (बिदअत) शोधून काढण्याने प्राप्त होऊ शकत नाही. मग ती दिसण्यात किती का चांगली असेना! अल्लाह्ची प्रसन्नता तर त्याच्या आज्ञापालनानेच प्राप्त होईल.

५) परंतु जरी त्यांनी उद्देश्य अल्लाह्ची प्रसन्नता सांगितला परंतु या उद्देश्याची त्यांनी पूर्ण पूेजर्तता केली नाही. नाहीतर ते बिदअत शोधून काढण्याच्या ऐवजी आज्ञापालनाचा मार्ग अनुसरते.

६) हे ते लोक आहेत जे ईसा عليه السلام च्या धर्मांवर कायम राहिले होते.

७) हा दुहेरी मोबदला त्या ईमानवाल्यांना मिळेल, जे नबी ﷺ च्या पूर्वी पहिल्या कोण्या पैगंबरावर ईमान ठेवीत होते. मग नबी ﷺ वरपण ईमान घेऊन आले. जसे कीं, हदीस मध्ये सांगण्यात आले आहे. (अल्‌बुखारी) एका दुसऱ्या भाष्यानुसार, जेव्हा ग्रंथधारी लोकांनी या गोष्टीवर गर्व केला कीं, त्यांना दुहेरी पुण्यप्रतिफळ मिळेल, तेव्हा अल्लाह्तआलाने मुसलमानाच्या बाबतीत हे महावाक्य अवतरीत केले (तपशीलाकरीता पहावे तफसीर इब्ने कसीर)

महावाक्ये २२ — **(५८) सू. मुजादिल:** — रुकूअ ३

اٰیَاتُهَا ٢٢ (٥٨) سُوْرَةُ الْمُجَادَلَةِ مَدَنِيَّةٌ (١٠٥) رُكُوْعَاتُهَا ٣

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

قَدْ سَمِعَ اللّٰهُ قَوْلَ الَّتِيْ تُجَادِلُكَ فِيْ زَوْجِهَا وَتَشْتَكِيْٓ اِلَى اللّٰهِ ۖ وَاللّٰهُ يَسْمَعُ تَحَاوُرَكُمَا ۭ اِنَّ اللّٰهَ سَمِيْعٌۢ بَصِيْرٌ ١

**खचित्‌च अल्लाहतआलाने त्या स्त्रीची गोष्ट ऐकली, जी तुझ्याशी** आपल्या पतीच्या बाबतीत वाद घालीत होती; आणि अल्लाहपुढे गाऱ्हाणे करीत होती. अल्लाहतआला तुम्हा उभयतांची प्रश्नोत्तरे ऐकत होता;[१] नि:संशय अल्लाहतआला ऐकणारा (व) पाहणारा आहे. १

اَلَّذِيْنَ يُظٰهِرُوْنَ مِنْكُمْ مِّنْ نِّسَاۗىِٕهِمْ مَّا هُنَّ اُمَّهٰتِهِمْ ۭ اِنْ اُمَّهٰتُهُمْ اِلَّا الّٰۗـِٔيْ وَلَدْنَهُمْ ۭ وَاِنَّهُمْ لَيَقُوْلُوْنَ مُنْكَرًا مِّنَ الْقَوْلِ وَزُوْرًا ۭ وَاِنَّ اللّٰهَ لَعَفُوٌّ غَفُوْرٌ ٢

तुमच्या तून जे लोक आपल्या पत्नींशी जिहार करतात, (म्हणजे त्यांना आई; म्हणून बसतात) त्या मुळांत त्यांच्या आई; बनून जात नाहीत; त्यांच्या आई तर त्याच आहेत, ज्यांच्या पोटी ते जन्माला आलेत.[२] खचित्‌च हे लोक एक निरर्थक आणि खोटी गोष्ट म्हणत आहेत. नि:संशय अल्लाहतआला माफ करणारा आणि क्षमाशील आहे.[३] २

وَالَّذِيْنَ يُظٰهِرُوْنَ مِنْ نِّسَاۗىِٕهِمْ ثُمَّ يَعُوْدُوْنَ لِمَا قَالُوْا فَتَحْرِيْرُ رَقَبَةٍ مِّنْ قَبْلِ اَنْ يَّتَمَاۗسَّا ۭ ذٰلِكُمْ تُوْعَظُوْنَ بِهٖ ۭ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ خَبِيْرٌ ٣

जे लोक आपल्या पत्नींशी 'जिहार' करतील, मग आपल्या सांगितलेल्या गोष्टी[४] परत घेतील तर त्यांच्यावर आपसांत एक दुसऱ्याला हात लावण्यापूर्वी[५] एका गुलामाला स्वतंत्र करणे आहे; त्याच्यापासून तुम्हाला उपदेश करण्यात येत आहे. आणि अल्लाहतआला तुमच्या कर्मांशी माहीतगार आहे. ३

فَمَنْ لَّمْ يَجِدْ فَصِيَامُ شَهْرَيْنِ مُتَتَابِعَيْنِ مِنْ قَبْلِ اَنْ يَّتَمَاۗسَّا ۚ فَمَنْ لَّمْ يَسْتَطِعْ فَاِطْعَامُ سِتِّيْنَ مِسْكِيْنًا ۭ ذٰلِكَ لِتُؤْمِنُوْا بِاللّٰهِ وَرَسُوْلِهٖ ۭ وَتِلْكَ حُدُوْدُ اللّٰهِ ۭ وَلِلْكٰفِرِيْنَ عَذَابٌ اَلِيْمٌ ٤

होय! परंतु ज्या मनुष्यांस (गुलाम) मिळणार नाही, त्यांच्यावर लागोपाठ दोन महिन्याचे उपवास ठेवणे आहेत, याच्यापूर्वी की त्यांनी एक दुसऱ्याला हात लावावा. आणि ज्या मनुष्यांस ही ताकदपण असणार नाही, त्यांच्यावर साठ गरीबांना जेऊ घालणे आहे. हे यासाठी की तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करावे; या अल्लाहच्या बांधीव मर्यादा आहेत आणि काफिरांकरताच दु:खदायक शिक्षा आहे. ४

اِنَّ الَّذِيْنَ يُحَاۗدُّوْنَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ كُبِتُوْا كَمَا كُبِتَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ وَقَدْ اَنْزَلْنَآ اٰيٰتٍۢ بَيِّنٰتٍ ۭ وَلِلْكٰفِرِيْنَ عَذَابٌ مُّهِيْنٌ ٥

नि:संशय जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतात, ते क्षुल्लक केले जातील,[६] जसे यांच्या पूर्वीचे लोक क्षुल्लक केले गेले होते;[७] आणि नि:संशय आम्ही स्पष्ट महावाक्ये उतारुन चुकलो आहोत. आणि नाकारणाऱ्यांसाठी तर फजितीची शिक्षा आहे. ५

يَوْمَ يَبْعَثُهُمُ اللّٰهُ جَمِيْعًا فَيُنَبِّئُهُمْ بِمَا عَمِلُوْا ۭ اَحْصٰىهُ اللّٰهُ وَنَسُوْهُ ۭ وَاللّٰهُ عَلٰي كُلِّ شَيْءٍ شَهِيْدٌ ٦

ज्या दिवशी अल्लाहतआला त्या सर्वांना उठवील, मग त्यांना त्यांनी केलेली कर्मे विदीत करील, ज्यांना अल्लाहने लिहून ठेवले, आणि ज्यांना हे विसरुन गेले होते;[८] आणि अल्लाहतआला सर्वसाक्षी आहे.[९] ६

اَلَمْ تَرَ اَنَّ اللّٰهَ يَعْلَمُ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ۭ مَا يَكُوْنُ مِنْ نَّجْوٰى ثَلٰثَةٍ اِلَّا هُوَ رَابِعُهُمْ وَلَا خَمْسَةٍ اِلَّا هُوَ سَادِسُهُمْ وَلَآ اَدْنٰى مِنْ ذٰلِكَ وَلَآ اَكْثَرَ اِلَّا هُوَ مَعَهُمْ اَيْنَ مَا كَانُوْا ۚ ثُمَّ يُنَبِّئُهُمْ بِمَا عَمِلُوْا يَوْمَ الْقِيٰمَةِ ۭ اِنَّ اللّٰهَ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ٧

काय तू पाहिले नाही की, अल्लाह आकाशांतील आणि पृथ्वीतील प्रत्येक गोष्टीशी वाकब आहे. तीन माणसांची सल्लामसलत होत नाही परंतु अल्लाह त्यांच्यात चवथा असतो. आणि न पांचची, परंतु त्यांचा सहावा तो असतो, आणि न याच्यापेक्षा कमी न याच्यापेक्षा जास्त परंतु तो बरोबरच असतो,[१०] जेथे कोठे ते असतील;[११] मग कयामतच्या दिवशी, त्यांना त्यांची कर्मे विदीत करीन;[१२] नि:संशय अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीशी वाकब आहे. ७

१) हा इशारा आहे, हजरत खौला बिन्ते मालिक बिन सअल्बाच्या घटनेकडे; ज्यांचे पती ह.औस ﵁ बिन सामितने त्यांच्याशी, जिहार करुन घेतला होता. जिहारचा अर्थ आहे, पत्नीला हे सांगून टाकणे, ''अन्ती अलैय्या कजहरि उम्मी (तू माझ्यावर माझ्या आईच्या पाठीसारखी आहे.) अज्ञानकाळांत जिहारला तलाक समजण्यांत येत असे. ह.खौला

फारच काळजीत पडली. त्या वेळेपर्यंत या बाबतीत काही हुकूम सादर झाला नव्हता. म्हणून त्या नबी ﷺ जवळ आल्यांत. तेव्हा आपण ﷺ नी सुद्धा काही मौन धारण केले; आणि त्या आपण ﷺ शी वाद आणि गाऱ्हाणे करीत राहिल्या. ज्यावर ही महावाक्ये अवतीर्ण झालीत, ज्याच्यांत जिहारची समस्या आणि त्याचा हुकूम आणि प्रायश्चित सांगण्यांत आले आहे. (अबु दाऊद) हजरत आयेशा ؓ फर्मावितात की, अल्लाहतआला कशा प्रकारे लोकांच्या गोष्टी ऐकणारा आहे की, ही स्त्री घराच्या एका कोपऱ्यांत, नबी ﷺ जवळ गाऱ्हाणे करीत आणि आपल्या पतीची तक्रार करीत राहिली. परंतु मी तिच्या गोष्टी ऐकत नव्हते. परंतु अल्लाहने आकाशांवरुन तिची गोष्ट ऐकून घेतली. (इब्ने माजा)

२) हा जिहारचा हुकूम सांगितला की, तुमच्या सांगून टाकल्याने तुमची पत्नी तुमची आई बनून जाणार नाही. जर आईच्या ऐवजी कोणी मनुष्य आपल्या मुलीला किंवा बहीण वगैरेच्या पाठीप्रमाणे आपल्या पत्नीला सांगून देईल, तर हा जिहार आहे किंवा नाही? इमाम मालिक आणि इमाम अबु हनीफा यालापण जिहार ठरवितात; जेव्हा की, दुसरे धर्मगुरु याला जिहार मान्य करीत नाहीत. (पहिले म्हणणेच बरोबर वाटते.) अशाच प्रकारे याच्यांत पण मतभेद आहेत की, पाठीच्या जागेवर जरकोणी असे म्हणेल की, तू माझ्या आईसारखी आहे, पाठीचे नांव घेणार नाही, तर धर्मगुरु म्हणतात की, जर जिहारच्या इरादाने तो सदरील शब्द म्हणेल, तर जिहार होईल. नाहीं तर दुसऱ्या स्वरुपांत होणार नाही. इमाम शाफई पण म्हणतात की, जिहार फक्त पाठीसारखे म्हणण्यानेच होईल. (फत्हुल कदीर)

३) म्हणूनच त्याने (म्हणजे अल्लाहने) प्रायश्चिताला, या निरर्थक आणि खोट्याच्या क्षमेचे साधन बनवून दिले.

४) आता या हुकमाचा तपशील सांगण्यांत येत आहे. रुजू चा (या ठिकाणी) अर्थ आहे, पत्नीशी संभोग करु इच्छील.

५) म्हणजे समागमापूर्वी त्याने प्रायश्चित्त घ्यावे. १) एका गुलामाला स्वतंत्र करणे. २) याची शक्ती नसल्यास लागोपाठ, खंड न पडू देता दोन महिन्यांचे उपवास. जर यांच्या दर्म्यान, धर्मशास्त्रीय सबबीशिवाय, उपवास सोडून दिला, तर नव्याने पुन्हा दोन महिन्याचे उपवास ठेवावे लागतील. धर्मशास्त्रीय सबबीने अभिप्रेत आजारपण किंवा प्रवास आहे. ३) जर लागोपाठ दोन महिन्याचे उपवास ठेवण्याची शक्ती नसेल, तर साठ गरीबांना जेऊ घालावे. काही म्हणतात की प्रत्येक मोतादाला दोन 'मुद्द' (अर्धे 'साअ' म्हणजे सव्वा किलो) आणि काही म्हणतात एक मुद्द पुरेसा आहे. परंतु कुरआनाच्या शब्दाने ठाऊक होते की, जेवण अशा प्रकारे खाऊं घातले जावे की, त्याचे पोट भरुन जावे किंवा एवढ्याच प्रमाणांत त्याला जेवण देण्यांत यावे एकाच वेळी सर्व काही खाऊं घालणे आवश्यक नाही; किंबहुना अनेक टप्प्यांत ही गणती पुरी केली जाऊं शकते. (फत्हुल कदीर) तथापि हे आवश्यक आहे, जो पर्यंत ही गणती पूर्ण न होऊन जाईल, पत्नीशी समागम करणे विहीत नाही.

६) 'कुबितू' म्हणजे भविष्यांत घडणाऱ्या घटनेला भूतकाळाने संबोधित करुन, स्पष्ट करून दिले की, याचे घडून येणे आणि प्रत्यक्षात उतरणे, अशाच प्रकारे निश्चित आहे, जसे की ते होऊन चुकले आहे. तात्पर्य, झाले पण असेच ! की हे मक्केचे मुशरिक, बद्रच्या दिवशी क्षुल्लक केले गेले, काही मारले गेले, काही कैदी झाले, आणि मुसलमान त्यांच्यावर प्रबळ राहिले. मुसलमानांचे प्रबळ होणे सुद्धा त्यांच्यासाठी फारच क्षुल्लकतेला कारणीभूत होते.

७) याच्याने अभिप्रेत मागील समूह आहेत, ज्या याच विरोधामुळे नष्ट झाल्यांत.

८) हे डोक्यांत निर्माण होणाऱ्या शंका कुशंकाचे उत्तर आहे की, पातकांची इतकी अधिकता आणि नकाराचे एवढे निरनिराळ्या प्रकारचे होणे आहे की त्यांची गणती करणे, उघडरित्या अशक्य आहे. अल्लाहतआलाने फर्माविले तुमच्यासाठी खचित्च अशक्य आहे. किंबहुना तुम्हास तर तुम्ही स्वत: केलेली सर्व कामे पण लक्षांत राहणार नाही. परंतु अल्लाहसाठी हे कठीण नाही. त्याने एकेकाचे कर्म सुरक्षित केले आहे.

९) त्याच्यासाठी कुठलीही गोष्ट गुप्त नाही. पुढे याची आणखी ताकीद आहे की तो प्रत्येक गोष्टीशी वाकब आहे.

१०) म्हणजे चर्चित संख्येचा विशेष म्हणून उल्लेख, यासाठी नाही की, तो या पेक्षा कमी किंवा यापेक्षा जास्त संख्येच्या दर्म्यान होणाऱ्या संभाषणाकडून अजाण असतो, किंबहुना ही संख्या तर एक उदाहरण म्हणून आहे. उद्देश्य हे दाखविणे आहे की, संख्या थोडी असो वा जास्त तो प्रत्येकाच्या बरोबर आहे आणि प्रत्येक उघड आणि गुप्त गोष्टीला तो जाणतो.

११) एकांतात असो वा सर्वांच्या समोर, शहरांत असो वा घनदाट अरण्यात, वस्ती असो किंवा निर्जन पर्वत अरण्ये आणि गुहांमध्ये; जेथे कोठे ते असतील, त्याच्यापासून लपून राहू शकत नाहीत.

१२) म्हणजे याच्याप्रमाणे तो प्रत्येकाला मोबदला देईल. पुण्यवानांना त्यांच्या पुण्याचा बदला, आणि पाप्याला त्याच्या पापाची शिक्षा.

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْنَ نُهُوْا عَنِ النَّجْوٰى ثُمَّ يَعُوْدُوْنَ
لِمَا نُهُوْا عَنْهُ وَيَتَنٰجَوْنَ بِالْاِثْمِ وَالْعُدْوَانِ وَمَعْصِيَتِ
الرَّسُوْلِ ۫ وَاِذَا جَآءُوْكَ حَيَّوْكَ بِمَا لَمْ يُحَيِّكَ بِهِ اللّٰهُ ۙ
وَيَقُوْلُوْنَ فِيْٓ اَنْفُسِهِمْ لَوْلَا يُعَذِّبُنَا اللّٰهُ بِمَا نَقُوْلُ ؕ حَسْبُهُمْ
جَهَنَّمُ ۚ يَصْلَوْنَهَا ۚ فَبِئْسَ الْمَصِيْرُ ﴿٨﴾

**काय तू या लोकांना पाहिले नाहीस? ज्यांना कुजबूज करण्यापासून मना करण्यांत आले होते, ते तरी सुद्धा मना केलेल्या कामाला दुसऱ्यांदा करतात.[१] आणि आपसांत पातकाची आणि जुलूम अत्याचाराची आणि पैगंबराच्या आज्ञाभंगाची कुजबूज करतात.[२] आणि जेव्हा तुझ्याजवळ येतात, तेव्हा तुला त्या शब्दात सलाम करतात, ज्या शब्दांनी अल्लाहतआलाने (तुला सलाम) सांगितला नाही.[३] आणि आपल्या मनांत म्हणतात, अल्लाहतआला आम्हास आमच्या या करण्यावर शिक्षा का करीत नाही;[४] यांच्यासाठी नरकाग्नी पुरेसा आहे, ज्यांत हे जातील;[५] तर ते फारच वाईट ठिकाण आहे.** ⑧

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا اِذَا تَنَاجَيْتُمْ فَلَا تَتَنَاجَوْا بِالْاِثْمِ
وَالْعُدْوَانِ وَمَعْصِيَتِ الرَّسُوْلِ وَتَنَاجَوْا بِالْبِرِّ
وَالتَّقْوٰى ؕ وَاتَّقُوا اللّٰهَ الَّذِيْٓ اِلَيْهِ تُحْشَرُوْنَ ﴿٩﴾

**अहो ईमानवाल्यांनो ! जेव्हा तुम्ही एकमेकांच्या कानांत बोलाल, तेव्हा हे बोलणे पातक व जुलूम आणि अत्याचार आणि पैगंबराच्या आज्ञाभंगाचे नसावे.[६] किंबहुना फायदेकारक आणि ईशभयाच्या गोष्टींवर विचार विमर्श[७] करा आणि त्या अल्लाहला भित रहा, ज्याच्याजवळ तुम्ही सर्व गोळा केले जाल.** ⑨

१) याच्याने मदीनेचे यहूदी आणि दांभिक लोक अभिप्रेत आहेत. जेव्हा मुसलमान यांच्या जवळून जात, तेव्हा हे आपसांत आपली डोकी जोडून अशा प्रकारे कुजबूज करीत की, मुसलमान असे समजत की, कदाचित् यांच्याविरुद्ध हे काही कट कारस्थान करीत आहेत किंवा मुसलमानांच्या कोण्या सैन्यावर शत्रुने हल्ला करुन त्यांचे नुकसान केले आहे; ज्याची बातमी यांच्याजवळ येऊन पोहचली आहे. मुसलमान अशा गोष्टींनी भयभित होऊन जात. म्हणून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी अशा प्रकारे कुजबूज करण्यापासून मना केले. परंतु थोड्याच काळानंतर त्यांनी हा निंदणीय प्रकार पुन्हा सुरू करुन दिला. महावाक्यामध्ये त्यांच्या याच कर्तृत्वाला सांगण्यांत येत आहे.

२) म्हणजे यांची कुजबूज पुण्य आणि ईशभयाच्या गोष्टीत होत नाही किंबहुना पाप, अत्याचार आणि पैगंबराच्या आज्ञाभंगावर आधारित असते. उदाहरणार्थ कोणाची निंदा, दोषारोपण, अश्लाघ्य बोलणे एक दुसऱ्याला पैगंबराच्या आज्ञाभंगावर उकसविणे वगैरे.

३) म्हणजे अल्लाहने तर सलामची ही पद्धत दाखविली की, तुम्ही अस्सलाम अलैकुम व रहमतुल्लाह् म्हणा. परंतु हे यहूदी नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सेवेत हजर होत, तर याच्या ऐवजी म्हणत अस्सामु अलैकुम किंवा अलैक (तुम्हास मृत्यु येवो!) म्हणून रसूल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम त्यांच्या उत्तरांत फक्त हे फर्मावित, व अलैकुम किंवा व अलैक (आणि तुमच्यावरच होवो!) आणि मुसलमानांना पण त्यांनी ﷺ ताकीद केली की, जेव्हा ग्रंथधारी लोक तुम्हांस सलाम करतील, तेव्हा तुम्ही उत्तरांत ''अलैक'' म्हणत जा! म्हणजे अलैका मा कुल्ता (तू जे म्हणाला आहेस, ते तुझ्यावरच लागू होवो !) (स.बुखारी)

४) ते आपसांत किंवा आपल्या मनांत म्हणत की जर हा खरा पैगंबर असता, तर अल्लाहतआला आमच्या या निंदणीय चाळ्यावर, आमची पकड जरूर करतां.

५) अल्लाहने फर्माविले की जर अल्लाहने आपल्या इच्छेने आणि परिपूर्ण बुद्धिमत्तेच्या अंतर्गत, इहलोकांत यांची लगेच पकड केली नाही, तर काय परलोकांत ते जहन्नमच्या शिक्षेपासून पण वांचून जातील ? नाही ! खचित्च नाही !! जहन्नम यांची वाट पहात आहे, ज्यांत ते दाखल होतील.

६) ज्या प्रमाणे यहूदी आणि दांभिकांची पद्धत आहे. हे जणू ईमानवाल्यांसाठी प्रशिक्षण आणि त्यांना कर्तृत्ववान बनविण्यासाठी सांगण्यांत येत आहे की, जर तुम्ही आपल्या ईमानाच्या दाव्यांत खरे आहांत तर तुमची कुजबूज, यहूदी आणि दांभिकांसारखी पातकावर असावयास नको.

७) म्हणजे ज्यांच्यात भलाईच भलाई असेल आणि जे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालनावर आधारित असेल, कारण हेच पुण्य आणि ईशभय आहे.

اِنَّمَا النَّجْوٰى مِنَ الشَّيْطٰنِ لِيَحْزُنَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَلَيْسَ بِضَآرِّهِمْ شَيْئًا اِلَّا بِاِذْنِ اللّٰهِ ؕ وَعَلَى اللّٰهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُؤْمِنُوْنَ ﴿١٠﴾

(वाईट) कुजबूज तर शैतानाचे काम आहे, ज्यामुळे ईमानवाल्यांना दु:ख पोहचावे [१] जरी अल्लाहतआलाच्या इच्छेशिवाय, ते त्यांना काही नुकसान पोहचवू शकत नाही. आणि ईमानवाल्यांना पाहिजे की, त्यांनी अल्लाहवरच भरवसा ठेवावा [२] (१०)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اِذَا قِيْلَ لَكُمْ تَفَسَّحُوْا فِى الْمَجٰلِسِ فَافْسَحُوْا يَفْسَحِ اللّٰهُ لَكُمْ ۚ وَاِذَا قِيْلَ انْشُزُوْا فَانْشُزُوْا يَرْفَعِ اللّٰهُ الَّذِيْنَ اٰمَنُوْا مِنْكُمْ ۙ وَالَّذِيْنَ اُوْتُوا الْعِلْمَ دَرَجٰتٍ ؕ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ خَبِيْرٌ ﴿١١﴾

अहो मुसलमानांनो! जेव्हा तुम्हास सांगण्यात येईल की, सभेत खुलून खुलून बसा, तेव्हा तुम्ही खुलून बसत जा. [३] अल्लाह तुम्हांस ऐसपैस जागा देईल [४] आणि जेव्हा सांगण्यात येईल, की उठून उभे रहा, तेव्हा तुम्ही उठून उभे रहात [५] जा. अल्लाहतआला तुमच्यातून, त्या लोकांना ज्यांनी ईमान आणले आहे, आणि ज्यांना ज्ञान दिले गेले आहे (अल्लाह) त्यांचे दर्जे वाढवील. [६] आणि अल्लाहतआला प्रत्येक (त्या कामाला) जे तुम्ही करीत आहांत (चांगल्याप्रकारे) जाणतो. (११)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اِذَا نَاجَيْتُمُ الرَّسُوْلَ فَقَدِّمُوْا بَيْنَ يَدَىْ نَجْوٰىكُمْ صَدَقَةً ؕ ذٰلِكَ خَيْرٌ لَّكُمْ وَاَطْهَرُ ؕ فَاِنْ لَّمْ تَجِدُوْا فَاِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿١٢﴾

अहो मुसलमानांनो! जेव्हा तुम्हास पैगंबराच्या कानांत काही गोष्ट सांगावयाची असेल, तर आपल्या कानांत गोष्ट सांगण्यापूर्वी काही दानधर्म करीत जा. [७] हे तुमच्यासाठी उत्तम आणि शुद्धीकारक आहे [८] मग जर तुम्हास (दान धर्म करण्यांस) काही मिळत नसेल, तर नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. (१२)

ءَاَشْفَقْتُمْ اَنْ تُقَدِّمُوْا بَيْنَ يَدَىْ نَجْوٰىكُمْ صَدَقٰتٍ ؕ فَاِذْ لَمْ تَفْعَلُوْا وَتَابَ اللّٰهُ عَلَيْكُمْ فَاَقِيْمُوا الصَّلٰوةَ وَاٰتُوا الزَّكٰوةَ وَاَطِيْعُوا اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ ؕ وَاللّٰهُ خَبِيْرٌ ۢ بِمَا تَعْمَلُوْنَ ﴿١٣﴾

काय तुम्ही आपल्या गुप्त गोष्टींच्या पूर्वी दानधर्म करण्याने भिऊन गेलेत? मग जेव्हा तुम्ही हे केले नाही, आणि अल्लाहतआलाने सुद्धा, तुम्हांस क्षमा करून टाकले. [९] तर आता (चांगल्या प्रकारे) नमाजीला कायम करा आणि जकात देत रहा. आणि अल्लाहचे आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करीत रहा. [१०] तुम्ही जे काही करीत आहांत, त्या (सर्वां) शी, अल्लाह माहितगार आहे. (१३)

اَلَمْ تَرَ اِلَى الَّذِيْنَ تَوَلَّوْا قَوْمًا غَضِبَ اللّٰهُ عَلَيْهِمْ ؕ مَا هُمْ مِّنْكُمْ وَلَا مِنْهُمْ ۙ وَيَحْلِفُوْنَ عَلَى الْكَذِبِ وَهُمْ يَعْلَمُوْنَ ﴿١٤﴾

काय तू त्या लोकांना पाहिले नाहीस? ज्यांनी या लोकांशी मैत्री केली, ज्यांच्यावर अल्लाह क्रोधायमान होऊन चुकला आहे. [११] न हे (दांभिक) तुमचे आहेत न त्यांचे आहेत. [१२] ज्ञान असून सुद्धा खोट्या गोष्टीवर शपथा खात आहेत. [१३] (१४)

اَعَدَّ اللّٰهُ لَهُمْ عَذَابًا شَدِيْدًا ؕ اِنَّهُمْ سَآءَ مَا كَانُوْا يَعْمَلُوْنَ ﴿١٥﴾

अल्लाहतआलाने त्यांच्याकरीता कडक शिक्षा तयार करून ठेवली आहे; [१४] वास्तविक जे काही करीत आहेत, वाईट करीत आहेत (१५)

اِتَّخَذُوْۤا اَيْمَانَهُمْ جُنَّةً فَصَدُّوْا عَنْ سَبِيْلِ اللّٰهِ فَلَهُمْ عَذَابٌ مُّهِيْنٌ ﴿١٦﴾

या लोकांनी तर आपल्या शपथांना ढाल बनवून ठेवले आहे [१५] आणि लोकांना अल्लाहच्या मार्गापासून अडथळा करीत राहतात. [१६] त्यांच्या करीता अपमानकारक शिक्षा आहे. (१६)

१) म्हणजे पातक आणि पैगंबरांचा आज्ञाभंग यावर आधारित विचारविमर्श, हे शैतानी काम आहे. कारण शैतानच अशा गोष्टींवर उभारत असतो. कारण की त्याने याच्या मार्फत ईमानवाल्यांना दु:खांत व्यस्त करावे.

२) परंतु हे विचार विमर्श आणि शैतानाच्या चाली, ईमानवाल्यांना काही नुकसान पोहचवू शकत नाही. परंतु जर अल्लाहतआलाची जर तशी इच्छा असेल. म्हणून तुम्ही आपल्या शत्रुंच्या या गुप्त चालींनी परेशान होत जाऊ नका. किंबहुना अल्लाहवर भरोसा ठेवा. यासाठी की, सर्व मामल्यांचा अधिकार त्याच्याच हातांत आहे. आणि तोच सर्व सामर्थ्यवान आहे; न की यहूदी आणि दांभिक लोक; जे तुम्हाला बर्बाद करू इच्छिता. विचार विमर्शाच्या बाबतीतच मुसलमानांना एक चारित्र्य विषयक सूचना ही देण्यात आली आहे की, जेव्हा तुम्ही तीन माणसे एकत्रित व्हाल, तेव्हा आपल्यातून एकाला सोडून, दोन माणसांनी आपसात विचार विमर्श करू नये. कारण की ही पद्धत, त्या एका माणसाला दु:खात टाकून देईल. (स.बुखारी, स. मुस्लिम) तथापि त्याची संमती आणि परवानगीने असे करणे ठीक

आहे. कारण की अशा स्वरुपांत, दोन माणसांचे विचार विमर्श करणे, कोणाच्या दु:खाला कारणीभूत होणार नाही.

३) याच्यांत मुसलमानांना सभेचे शिष्टाचार सांगण्यांत येत आहेत. सभेचा शब्द सर्व साधारण आहे. जो प्रत्येक त्या सभेला समाविष्ट करतो, ज्यांत मुसलमान भलाई आणि पुण्य संपादण्याकरीता एकत्र झाले असावेत. धर्म प्रवचन आणि उपदेशाची सभा असावी किंवा शुक्रवार ची सभा असावी (तफसीर अल्कुर्तबी). ''खुले खुले बसा'' चा अर्थ आहे की सभेचे वर्तूळ विस्तृत ठेवा. कारण की, मागून येणाऱ्यांसाठी बसण्यासाठी जागा रहावी. वर्तुळ आकुंचित ठेवू नका की मागून येणाऱ्यासाठी उभे रहावे लागेल किंवा कोण्या बसलेल्याला उठवून, त्याचे जागेवर त्याने बसावे की या दोन्ही गोष्टी शिष्टाचाराला धरून नाहीत. म्हणून नबी ﷺ नी पण फर्माविले, ''कोणी मनुष्याने कोण्या दुसऱ्या माणसाला, त्याच्या जागेवरून उठवून स्वत:न बसावे. या करीता सभेच्या वर्तुळाला विस्तृत करून घ्या.'' (स. बुखारी, स. मुस्लिम)

४) म्हणजे याच्या बदल्यांत अल्लाहतआला तुम्हांस विस्तृतता आणि विशालता प्रदान करील, जेथे पण तुम्ही विस्तृतता आणि विशालतेचे इच्छुक असाल उदाहरणार्थ घरांत, रोजीमध्ये कबरमध्ये प्रत्येक ठिकाणी विस्तृतता आणि विशालता प्रदान करील.

५) म्हणजे जिहाद करीता, नमाज करीता किंवा कुठल्याही सत्कार्याकरीता किंवा अर्थ आहे की, जेव्हा सभेतून उठून जाण्यांस सांगितले जाईल, तर लगेच चालले जा. मुसलमानांना हा हुकूम यासाठी दिला गेला की, सहाबा किराम ﷺ नबी ﷺ च्या सभेतून उठून जाणे पसंत करीत नसत. परंतु अशा प्रकारे काही वेळा, त्या लोकांना त्रास होत असे, जे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमशी एकांतात काही गोष्ट करू इच्छित होते.

६) म्हणजे ईमानवाल्यांचे दर्जे, ज्यांच्याजवळ ईमान नाही त्यांच्यावर, आणि ज्ञानी लोकांचे दर्जे, ईमानवाल्यांवर उच्च करेल. ज्याचा अर्थ हा झाला की, ईमानाबरोबर धर्माच्या ज्ञानाशी परिचय, आणखी दर्जे उंच करण्याला कारणीभूत आहे.

७) प्रत्येक मुसलमान नबी ﷺ शी चर्चा आणि एकांतात संभाषण करण्याची इच्छा बाळगत होता. ज्यामुळे नबी ﷺला फारच त्रास होई. काही म्हणतात की, दांभिक लोक काही कारण नसतांना नबी ﷺ शी संभाषणात व्यस्त रहात असत. ज्यामुळे मुसलमानांना त्रास वाटे. म्हणून अल्लाहने हा हुकूम सादर केला. कारण की, संभाषण करण्याच्या सर्वसाधारण आवडीला आळा बसावा.

८) उत्तम यासाठी की, दानधर्माने तुमच्याच दुसऱ्या गरीब मुसलमानांचा फायदा व्हावा आणि शुद्धीकरण यासाठी की, हे एक पुण्यकर्म, आणि अल्लाहचे आज्ञापालन आहे. ज्याच्याने मनुष्याच्या जीवाचे पावित्र्य होते. याच्याने हे पण ठाऊक झाले की, हा हुकूम आवड म्हणून होता, आवश्यक नव्हता.

९) हा हुकूम जरी आवड म्हणून होता, तरी मुसलमानांना तो जडच होता, म्हणून अल्लाहतआलाने त्याला लवकरच रद्द करून टाकले.

१०) म्हणजे कर्तव्ये आणि आदेशांचे पालन करणे, त्या दानधर्माचा बदल होऊन जाईल ज्याला अल्लाहने तुमच्यावर हलका करण्यासाठी माफ करून टाकले आहे.

११) ज्यांच्यावर अल्लाहचा प्रकोप अवतरीत झाला, ते कुरआन करीमच्या खुलाशाप्रमाणे यहूदी आहेत आणि यांच्याशी दोस्ती करणारे, दांभिक आहेत. ही महावाक्ये त्यावेळी अवतरीत झाली, जेव्हा मदीनेमध्ये दांभिकांचा पण जोर होता; आणि यहूद्यांची कारस्थानेपण जोरावर होती. आतापर्यंत यहूद्यांना तडीपार केलेले नव्हते.

१२) म्हणजे हे दांभिक न मुसलमान आहेत न धर्माच्या दृष्टीने यहूदीच आहेत. मग हे काय हूद्यांशी मैत्री करतात? फक्त एवढ्यासाठी की, त्यांच्या आणि यहूद्यांच्या दर्म्यान, नबी ﷺ आणि इस्लामशी वैर हे एक समान आहे.

१३) आणि शपथा वाहून मुसलमानांना सांगतात की आम्ही सुद्धा तुमच्याच सारखे मुसलमान आहोत. किंवा यहूद्यांशी याचे काही संबंध नाहीत.

१४) म्हणजे यहूद्यांशी मैत्रीपूर्ण संबंध ठेवणे आणि खोट्या शपथा वाहिल्यामुळे.

१५) अयमान यमीनचे अनेकवचन आहे. शपथेच्या अर्थात. म्हणजे ज्याप्रमाणे ढालीने शत्रुच्या वारांना अडवून आपला बचाव केला जातो, अशाच प्रकारे त्यांनी आपल्या शपथांना मुसलमानांच्या तलवारीपासून वांचण्याकरीता, ढाल बनवून ठेवले आहे.

१६) म्हणजे खोट्या शपथा वाहून हे स्वत:ला मुसलमान जाहीर करतात. ज्यामुळे बहुतेक लोकांना यांच्या बाबतीत वास्तविक गोष्टीचे आकलन होत नाही. आणि ते यांच्या भूलथापांच्या गोष्टीत येऊन, इस्लाम मान्य करण्यापासून वंचित राहून जातात. आणि अशाच प्रकारे लोकांना अल्लाहच्या मार्गापासून अडथळा करण्याचा अपराध पण करतात.

لَن تُغْنِىَ عَنْهُمْ أَمْوَٰلُهُمْ وَلَآ أَوْلَٰدُهُم مِّنَ ٱللَّهِ شَيْـًٔا ۚ أُو۟لَٰٓئِكَ أَصْحَٰبُ ٱلنَّارِ ۖ هُمْ فِيهَا خَٰلِدُونَ ﴿١٧﴾

त्यांची संपत्ती आणि त्यांची संतती अल्लाहच्या जवळ काही कामा येणार नाही. हे तर जहन्नमी आहेत. सदासर्वदा ते याच्यातच राहतील. (१७)

يَوْمَ يَبْعَثُهُمُ ٱللَّهُ جَمِيعًا فَيَحْلِفُونَ لَهُۥ كَمَا يَحْلِفُونَ لَكُمْ ۖ وَيَحْسَبُونَ أَنَّهُمْ عَلَىٰ شَىْءٍ ۚ أَلَآ إِنَّهُمْ هُمُ ٱلْكَٰذِبُونَ ﴿١٨﴾

ज्या दिवशी अल्लाहतआला या सर्वांना उभा करेल, तर हे ज्या प्रमाणे तुमच्यासमोर शपथा वाहत आहेत, (अल्लाहतआलाच्या) समोर सुद्धा शपथा वाहू लागतील, [१] आणि समजतील की, ते पण काही (प्रमाणावर) आहेत. लक्षांत ठेवा[२] की, नि:संशय हे लबाड आहेत. (१८)

ٱسْتَحْوَذَ عَلَيْهِمُ ٱلشَّيْطَٰنُ فَأَنسَىٰهُمْ ذِكْرَ ٱللَّهِ ۚ أُو۟لَٰٓئِكَ حِزْبُ ٱلشَّيْطَٰنِ ۚ أَلَآ إِنَّ حِزْبَ ٱلشَّيْطَٰنِ هُمُ ٱلْخَٰسِرُونَ ﴿١٩﴾

यांच्यावर शैतानाने वर्चस्व प्राप्त करून घेतले आहे [३] आणि त्यांना अल्लाहचे स्मरण विसरवून दिले आहे. [४] हे शैतानी सैन्य आहे काही शंका नाही की शैतानी सैन्यच अखेर तोट्यात राहील. [५] (१९)

إِنَّ ٱلَّذِينَ يُحَآدُّونَ ٱللَّهَ وَرَسُولَهُۥٓ أُو۟لَٰٓئِكَ فِى ٱلْأَذَلِّينَ ﴿٢٠﴾

नि:संशय अल्लाहतआलाचा आणि त्याच्या पैगंबराचा जे लोक विरोध[६] करतात, तेच लोक सर्वांत जास्त क्षुल्लकांमधून आहेत. [७] (२०)

كَتَبَ ٱللَّهُ لَأَغْلِبَنَّ أَنَا۠ وَرُسُلِىٓ ۚ إِنَّ ٱللَّهَ قَوِىٌّ عَزِيزٌ ﴿٢١﴾

अल्लाहतआला लिहून चुकला [८] आहे की, नि:संशय मी आणि माझे पैगंबर प्रबळ राहतील. खचित्‌च अल्लाहतआला बलवान आणि परमसमर्थ आहे. [९] (२१)

१) म्हणजे यांच्या दुर्भाग्य आणि कठीण मनाची पराकाष्ठा आहे की, कयामतच्या दिवशी, जेथे कुठलीही गोष्ट गुप्त राहणार नाही, तेथे सुद्धा हे अल्लाहच्या समोर खोट्या शपथा वहाण्याची धीट हिम्मत करतील.

२) म्हणजे ज्याप्रमाणे जगात ते वेळ निभावून नेण्याकरीता, खोट्या शपथा वाहून काही फायदा उचलून घेत होते, तेथे पण समजतील की, या खोट्या शपथा त्यांच्याकरीता फायदेकारक राहतील.

३) 'इस्तहवज' चा अर्थ आहे घेरून घेतले, त्यांना आपल्या कंपाऊंडमध्ये घेरून घेतले, एकत्र गोळा करून घेतले, म्हणूनच याचे भाषांतर वर्चस्व प्राप्त करून घेतले, असा केला जातो की, वर्चस्वांत हे सर्व भावार्थ येऊन जातात.

४) म्हणजे त्याने ज्या गोष्टी करण्याचा हुकूम दिला आहे, त्यापासून शैतानाने त्यांना गाफील करून दिले आहे. आणि ज्या गोष्टीपासून त्याने मना केले आहे, त्या तो यांच्याकडून करवून घेतो. त्यांना सुंदर दाखवून, किंवा चुकीच्या समजुतीत टाकून, किंवा आशा आकांक्षामध्ये टाकून.

५) म्हणजे संपूर्ण तोटा त्यांच्याच वाट्याला येईल. जणू दुसरे, त्यांच्या तुलनेत तोट्यांतच नाही. यासाठी की त्यांनी जहन्नमचा सौदा, बहकणे स्वीकारून करून घेतला, अल्लाहवर कुभांड रचले. आणि इहलोकांत आणि परलोकांत खोट्या शपथा वाहत राहिलेत.

६) 'मुहाद्दतून' असा तीव्र विरोध, अहंकार आणि भांडणाला म्हणतात की, दोन्ही पक्षांचे आपसांत मिळणे फारच कठीण व्हावे. जणू उभयंता दोन किनाऱ्यांवर आहेत. जे एक दुसऱ्याच्या विरुद्ध आहेत. याचसाठी हा मनाईच्या भावार्थांत पण उपयोगांत आणला जातो. आणि म्हणूनच दरबान आणि पहारेकऱ्याला सुद्धा 'हद्दाद' म्हटले जाते. (फत्हुल कदीर)

७) म्हणजे ज्या प्रमाणे मागील उम्मतीमध्ये, अल्लाह आणि पैगंबरांच्या विरोधकांना क्षुल्लक आणि बर्बाद केले गेले, यांची गणती सुद्धा याच क्षुल्लक झालेल्यांमध्ये होईल. आणि यांच्या वाट्याला सुद्धा इहलोक आणि परलोकाची क्षुल्लकता आणि अपमान याच्याशिवाय काही येणार नाही.

८) म्हणजे दैव आणि लौहे महफुज मध्ये, ज्यात काही बदल होऊ शकत नाही. हा विषय सू.मोमीन-५१/५२ मध्ये सुद्धा सांगण्यात आला आहे.

९) जेव्हा ही गोष्ट लिहिणारा, सर्वांवर प्रबळ आणि फारच बलवान आहे; तर मग आणखी कोण आहे, जो या निर्णयांत बदल करूंशकेल ? अर्थ हा झाला की हा फैसला अटल आणि न बदलणारा आहे.

لَا تَجِدُ قَوْمًا يُّؤْمِنُوْنَ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ يُوَآدُّوْنَ
مَنْ حَآدَّ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ وَلَوْ كَانُوْٓا اٰبَآءَهُمْ اَوْ اَبْنَآءَهُمْ
اَوْ اِخْوَانَهُمْ اَوْ عَشِيْرَتَهُمْ ؕ اُولٰٓئِكَ كَتَبَ فِىْ قُلُوْبِهِمُ
الْاِيْمَانَ وَاَيَّدَهُمْ بِرُوْحٍ مِّنْهُ ؕ وَيُدْخِلُهُمْ جَنّٰتٍ تَجْرِىْ
مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ رَضِىَ اللّٰهُ عَنْهُمْ وَرَضُوْا
عَنْهُ ؕ اُولٰٓئِكَ حِزْبُ اللّٰهِ ؕ اَلَآ اِنَّ حِزْبَ اللّٰهِ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ﴿٢٢﴾

**अल्लाहतआलावर आणि कयामतच्या दिवसावर ईमान ठेवणाऱ्यांना आपण (सल्ल.) अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करणाऱ्यांशी प्रेम बाळगणारे मुळीच पावणार नाही.[१] जरी ते त्यांचे वडील, किंवा त्यांचे मुलगे किंवा त्यांचे भाऊ किंवा त्यांच्या कुटूंब-घराण्याचे (प्रियच) का असेनात![२] हेच लोक आहेत ज्यांच्या मनांत, अल्लाहतआलाने ईमानाला लिहून दिले आहे.[३] आणि ज्यांचे समर्थन आपल्या आत्म्याने केले आहे.[४] आणि ज्यांना त्या स्वर्गांत दाखल करीन, ज्यांच्या खाली पाण्याचे पाट वाहत आहेत, जेथे ते निरंतर राहतील. अल्लाह त्यांच्याशी खूष आहे आणि हे अल्लाहशी खूष आहेत.[५] हा अल्लाहचा समूह आहे. लक्षांत ठेवा! नि:संशय अल्लाहच्या समूहवालेच सफल लोक आहेत[६] (२२)**

१) या महावाक्यांत अल्लाहने खुलासा केला की, जे अल्लाहवर आणि परलोकावर ईमान ठेवण्यांत परीपूर्ण असतात. ते अल्लाह व पैगंबरांच्या शत्रुंशी प्रेम आणि संबंध ठेवीत नाहीत. जणू ईमान आणि अल्लाह व पैगंबरांच्या शत्रुंचे प्रेम आणि मदत एका अंत:करणांत जमा होऊ शकत नाही. हा विषय कुरआन मजीदमध्ये आणखी पण कित्येक ठिकाणी सांगण्यांत आला आहे. उदाहरणार्थ सू. आले इमरान-२८, सू.तौबा-२४ वगैरे.

२) यासाठी की त्याचे ईमान त्यांना त्यांच्या प्रेमापासून मना करते. आणि ईमानाचे मूळ वाडवडील कुटुंबीय, भाऊबंदी आणि घराणे व नातेसंबंध, यांचे प्रेम जास्त महत्त्वाची आणि आवश्यक आहे. म्हणून सहाबा किराम ﷺ नी कृतीने असे करून दाखविले. एका मुसलमान सहाबी ने, आपले वडील, आपले मुलगे, आपले भाऊ आणि आपले काका, मामा आणि दुसऱ्या नातेवाईकांना, ठार मारण्यापासून पळ काढला नाही. जर ते कुफ्रच्या साथ देण्यांत काफिरांसमवेत लढणाऱ्यांमध्ये शामील होत. चारित्र्य आणि इतिहासाच्या पुस्तकांमध्ये, ही उदाहरणे नोंद झालेली आहेत. याच संदर्भात बद्रच्या युद्धातील घटना पण उल्लेखनीय आहे. की जेव्हा बद्रच्या कैद्यांबाबत सल्ला मसलत झाली की, त्यांना प्राणमूल्य घेऊन सोडून दिले जावे की, ठार करून टाकले जावे. जेव्हा ह.उमर ﷺ नी सल्ला दिला होता की, या कैद्यांतून प्रत्येक कैद्याला, त्याच्या नातेवाईकाच्या हवाली केले जावे. ज्याला त्याने स्वत: आपल्या हाताने ठार करावे आणि अल्लाहतआलाला ह.उमर ﷺ चा हाच सल्ला पसंत पडला होता. (तपशीला करता पहावे सू.अन्फाल आ. ६७ चा समास)

३) म्हणजे पक्के आणि मजबूत करून दिले.

४) 'रुह' ने अभिप्रेत आपली खास मदत, किंवा ईमानाचा प्रकाश आहे. जो यांना त्यांच्या चर्चित वैशिष्ट्यांमुळे प्राप्त झाला.

५) म्हणजे जेव्हा हे प्रथम मुसलमान सहाबा किराम, ईमानाच्या आधारावर आपल्या प्रिय नातेवाईकांशी नाराज होऊन गेले, येथ पावेतो की, त्यांना आपल्या हातांनी ठार करण्यांत मागे पुढे पाहिले नाही, तेव्हा अल्लाहने याच्या बदल्यांत त्यांना आपली प्रसन्नता बहाल केली. आणि त्यांच्यावर अशाप्रकारे आपल्या बक्षिसांची वर्षा केली की ते पण अल्लाहशी खूष होऊन गेलेत. म्हणून महावाक्यांत वर्णन केलेला, मान सन्मान, ''रजी अल्लाह अन्हुम् व रजु अन्हु'' जरी खास सहाबा किराम च्या बाबतीत अवतीर्ण झालेला नाही; तथापि ते याला परिपूर्ण पात्र आहेत. म्हणूनच याच्या शब्दकोषीय भावार्थाला समोर ठेवून, चर्चित वैशिष्टांनी संपन्न प्रत्येक मुसलमान 'रजी अल्लाह अन्हु' ला पात्र बनूशकतो. जसे शब्द कोषीय अर्थाच्या अनुषंगाने, प्रत्येक मुसलमान मनुष्यावर ''अलैहिम् सलात व स्सलाम'' चा (शुभेच्छा दर्शक वाक्य म्हणून) वापर केला जाऊ शकतो. परंतु अहले सून्नत ने याच्या शब्दकोषीय भावार्थापासून दूर होऊन, यांना सहाबा किराम आणि पैगंबर लोक, यांच्याशिवाय आणखी कोणासाठी बोलणे लिहीणे योग्य ठरविले नाही. ही जणू निशाणी आहे; रजी अल्लाह अन्हुम, सहाबा करिता, व अलैहिस् सलात वस्सलाम पैगंबर लोकांसाठी. हे असेच आहे जसे 'रहमतुल्लाहि अलैहि' किंवा 'रहमहुल्लाहुतआला' (अल्लाहची दया त्याच्यावर होवो किंवा अल्लाहने त्याच्यावर दया करावी) चा उपयोग शब्दकोषीय भावार्थाच्या अनुषंगाने, जिवंत आणि मृत दोघांवर होऊ शकतो. कारण की हा एक शुभेच्छादर्शक शब्द आहे, ज्याचे गरजवंत जिवंत आणि मृत दोघेही आहेत. परंतु याचा उपयोग मृतांसाठी खास होऊन चुकला आहे. म्हणून याला जिवंत व्यक्तींसाठी उपयोगांत आणले जात नाही.

६) म्हणजे ईमानवाल्यांचा समूह सफलता पावणारा आहे. दुसरे त्यांच्या तुलनेत, असेच असतील, जसे ते साफल्यापासून बिलकुल वंचित आहे. जसे की ते खरोखर परलोकांत (साफल्यापासून) वंचित राहतील.

اٰیاتها ٢٤ (٥٩) سُوْرَةُ الْحَشْرِ مَدَنِيَّةٌ (١٠١) رُكُوْعَاتُهَا ٣

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

महावाक्ये २४ | **(५९) सू. अल-हश्र** | रुकूअ ३

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

سَبَّحَ لِلّٰهِ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ ۚ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿١﴾

**आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तूअल्लाहतआलाचे पावित्र्य वर्णन करीत आहे आणि तो सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. (१)**

هُوَ الَّذِيْٓ اَخْرَجَ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ اَهْلِ الْكِتٰبِ مِنْ دِيَارِهِمْ لِاَوَّلِ الْحَشْرِ ؕ مَا ظَنَنْتُمْ اَنْ يَّخْرُجُوْا وَظَنُّوْٓا اَنَّهُمْ مَّانِعَتُهُمْ حُصُوْنُهُمْ مِّنَ اللّٰهِ فَاَتٰىهُمُ اللّٰهُ مِنْ حَيْثُ لَمْ يَحْتَسِبُوْا ۗ وَقَذَفَ فِيْ قُلُوْبِهِمُ الرُّعْبَ يُخْرِبُوْنَ بُيُوْتَهُمْ بِاَيْدِيْهِمْ وَاَيْدِي الْمُؤْمِنِيْنَ ۗ فَاعْتَبِرُوْا يٰٓاُولِي الْاَبْصَارِ ﴿٢﴾

**तोच आहे ज्याने ग्रंथधारी लोकांमधून काफिरांना त्यांच्या घरातून पहिले हश्रच्या वेळी काढले.[१] तुम्हास तर याची कल्पना पण नव्हती की ते निघतील. आणि ते स्वत: सुद्धा समजत होते की, त्यांचे (मजबूत) किल्ले त्यांना अल्लाहच्या शिक्षेपासून वाचवून[२] घेतील. तर त्यांच्यावर अल्लाहची (शिक्षा) अशा जागी येऊन पडली की, त्यांना कल्पना सुद्धा नव्हती.[३] आणि त्यांच्या अंत:करणात अल्लाहने धाक बसवून दिला.[४] ते आपल्या घरांना आपल्याच हातांनी बर्बाद करणे सुरू करून दिले होते[५] आणि मुसलमानांच्या हातून (बर्बाद झाले)[६] तर हे डोळ्यावाल्यांनो ! (तुम्ही यापासून) धडा घ्या[७] (२)**

وَلَوْلَآ اَنْ كَتَبَ اللّٰهُ عَلَيْهِمُ الْجَلَآءَ لَعَذَّبَهُمْ فِي الدُّنْيَا ؕ وَلَهُمْ فِي الْاٰخِرَةِ عَذَابُ النَّارِ ﴿٣﴾

**आणि जर अल्लाहतआलाने हद्दपार होणे त्यांच्या नशिबी न केले असते. तर खचित्च त्यांना या जगांतच शिक्षा देता.[८] आणि परलोकांत (तर) यांच्यासाठी आगीची शिक्षा तर आहेच (३)**

ذٰلِكَ بِاَنَّهُمْ شَآقُّوا اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ ۚ وَمَنْ يُّشَآقِّ اللّٰهَ فَاِنَّ اللّٰهَ شَدِيْدُ الْعِقَابِ ﴿٤﴾

**हे यासाठी की, त्यांनी अल्लाहतआलाचा आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला आणि जो पण अल्लाहचा विरोध करेल, तर अल्लाहतआला पण कडक शिक्षा करणारा आहे. (४)**

مَا قَطَعْتُمْ مِّنْ لِّيْنَةٍ اَوْ تَرَكْتُمُوْهَا قَآئِمَةً عَلٰٓى اُصُوْلِهَا فَبِاِذْنِ اللّٰهِ وَلِيُخْزِيَ الْفٰسِقِيْنَ ﴿٥﴾

**तुम्ही खजुरीचे जे वृक्ष कापून टाकले, किंवा ज्यांना तुम्ही आपल्या मुळ्यांवर बाकी राहू दिले, हे सर्व अल्लाहच्या आज्ञेने होते आणि यासाठी सुद्धा की, आज्ञाभंजकास अल्लाहतआलाने फजीत करावे.[९] (५)**

وَمَآ اَفَآءَ اللّٰهُ عَلٰى رَسُوْلِهٖ مِنْهُمْ فَمَآ اَوْجَفْتُمْ عَلَيْهِ مِنْ خَيْلٍ وَّلَا رِكَابٍ وَّلٰكِنَّ اللّٰهَ يُسَلِّطُ رُسُلَهٗ عَلٰى مَنْ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿٦﴾

**आणि यांची जी मालमत्ता अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराच्या हाती लावली आहे, ज्यावर न तुम्ही आपले घोडे पळविले आहे, न उंट. किंबहुना अल्लाहतआला आपल्या पैगंबराला, ज्यावर इच्छील, वर्चस्व प्राप्त करून देतो[१०] आणि अल्लाहतआला सर्व सामर्थ्यवान आहे. (६)**

१) मदीनेच्या आजुबाजूला यहूद्यांची तीन घराणी वस्ती करून होती. बनु नजीर, बनु कुरैज, आणि बनु कयनुकाअ मदिनेला हिजरत केल्यानंतर नबी ﷺ नी त्यांच्याशी तहपण केला. परंतु हे लोक पडद्याआड कारस्थाने करीत राहिले; आणि मक्केच्या काफिरांशी पण मुसलमानांच्या विरुद्ध संबंध ठेवला. येथपावेतो की, एका वेळी जेव्हा की आपण ﷺ त्यांच्याजवळ गेले होते, बनु नजिरने रसूलुल्लाह ﷺ वर, वरून एक जड दगड फेंकून आपणांस मारून टाकण्याचे कारस्थान तयार केले. ज्याच्याने वह्यामार्फत वेळेवर सूचना करून दिली गेली. आणि आपण तेथून परत चालले आले. त्यांच्या या वचन भंगामुळे रसूल करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी, त्यांच्यावर सैन्य घातले. हे थोडे दिवस आपल्या किल्ल्यांत घेरलेले राहिले. सरशेवटी त्यांनी जीव वांचविण्यासाठी हद्दपार होण्यावर तयार असल्याचे जाहीर केले. ज्याला रसूलुल्लाह ﷺ नी मान्य करून टाकले. याला अव्वली हश्र ने (पहिल्या वेळेस गोळा होणे) यासाठी संबोधित केले आहे की, हे यांचे पहिले हद्दपार होणे होते. जे मदीनेहून झाले. येथून ते खैबर येथे जाऊन स्थाईक होऊन गेले. तेथून ह.उमर رضي الله عنه नी आपल्या काळांत त्यांना दुसऱ्यांदा हद्दपार केले. आणि सीरियाकडे ढकलून दिले. जेथे असे म्हणतात की, सर्व मनुष्यांचे शेवटचे एकत्र गोळा होणे होईल.

२) यासाठी की त्यांनी फारच मजबूत किल्ले बांधून ठेवले होते. ज्यांवर त्यांना गर्व होता. आणि मुसलमान पण समजत

होते की, इतक्या सहजतेने हे किल्ले जिंकून घेता येणार नाही.
३) आणि तो हाच होता की, रसूलुल्लाह ﷺ नी त्यांच्यावर घेराव टाकून दिला होता, जो त्यांच्या कल्पनेत पण नव्हता.
४) या धाकामुळेच त्यांनी हद्दपार होण्याला राजी असल्याचे जाहीर केले नाही तर अब्दुल्लाह बिन उबई (ढांभिकांचा सरदार) आणि दुसऱ्या इतर लोकांनी, त्यांना संदेश पाठविले होते की, तुम्ही मुसलमानांसमोर झुकू नये, आम्ही तुमच्या बरोबर आहोत. याशिवाय अल्लाहतआलाने नबी करीम ﷺ ला ही खास खूबी प्रदान केली होती की, शत्रू एक महिन्याच्या प्रवासाच्या लांबी एवढ्या दुरीवरून आपण ﷺ कडून धाक खाऊन घेत होता. म्हणूनच फारच दहशत आणि घाबरणे त्यांच्यात चालू होऊन गेले. आणि संपूर्ण साधन सामुग्री आणि शस्त्रास्त्रे असून सुद्धा. त्यांनी शस्त्रे खाली ठेवून दिलीत. आणि फक्त ही अट मुसलमानांकडून मान्य करवून घेतली की जेवढा सामान लादून ते घेऊन जाऊं शकतात, त्यांना घेऊन जाण्याची परवानगी असावी. म्हणून या परवानगीमुळे त्यांनी आपल्या घराचे दरवाजे आणि झरोके सुद्धा उपटून काढले कारण की, त्यांना आपल्या बरोबर घेऊन जावे.
५) म्हणजे जेव्हा त्यांना खात्री होऊन चुकली की, आता हद्दपार होणे अटळ आहे. तेव्हा त्यांनी घेराव असतांनाच, आंतून आपल्या घरांना तोडणे सुरू करून दिले. कारण की, ती मुसलमानांच्या पण कामा येऊ नये किंवा हा अर्थ आहे की, सामान घेऊन जाण्याच्या परवानगीने पूर्ण फायदा उचलण्यासाठी, त्यांनी आपआपल्या उंटांवर जितका सामान लादला जाऊ शकत होता, आपली घरे खोदून खोदून ते सामान त्यांनीं उंटावर ठेवून घेतले.
६) बाहेरून मुसलमान त्यांच्या घरांना नष्ट करीत राहिले कारण की, त्यांच्यावर पकड करणे सोपे होऊन जावे; किंवा हा अर्थ आहे की, त्यांच्या पाडलेल्या घरांतून बाकी सामान काढून हस्तगत करणे, यासाठी मुसलमानांना जास्त श्रम करावे लागले.
७) की कशा प्रकारे अल्लाहने त्यांच्या मनांत मुसलमानांचा धाक बसविला; वास्तविक तो एक बलवान आणि शस्त्र सज्ज कबीला होता; परंतु जेव्हांअल्लाहतआलाकडून, कर्म करण्याची सवलत संपून गेली आणि अल्लाहने आपल्या पकडीच्या जाळ्यांत त्यांना घेरण्याचा निर्णय करून घेतला, तेव्हांमग त्यांची शक्ती आणि शस्त्रात्रे त्यांच्या कामास आले नाहीत; आणि दुसरे सहाय्यक आणि मददगार त्यांची काही मदत करु शकले नाहीत.
८) म्हणजे अल्लाहने त्यांच्या दैवांत पूर्वीपासूनच, अशाप्रकारे त्यांची हद्दपार होणे लिहीले नसते, तर त्यांना या जगांतच सक्त शिक्षेत ग्रस्त केले असते. जसे की नंतर त्यांचे भाऊ, यहूद्यांचे एक दुसरे घराणे (बनु कुरैजा) ला अशाच शिक्षेत ग्रस्त केले गेले की, त्यांच्या तरूण पुरुषांना ठार करण्यांत आले. दुसऱ्यांना कैदी बनविण्यांत आले; आणि त्यांची संपत्ती मुसलमानांकरीता गनीमत बनवून दिली गेली.
९) 'लिनतिन' खजुरीचा एक प्रकार आहे, जसे अजवा, बरनी वगैरे खजुरींचे प्रकार आहेत. वेढा घातला असतांना, नबी ﷺ च्या हुकूमाने मुसलमानांनी बनु नजीरच्या खजुरींच्या झाडांना आग लाऊन दिली; काही वृक्ष कापून टाकले; आणि काही सोडून दिले. ज्याचा उद्देश्य शत्रुच्या आडपडद्याला नष्ट करणे आणि हे स्पष्ट करणे होते की, आता मुसलमान तुमच्यावर प्रबळ आहेत; ते तुमच्या मालमत्तेत जसे इच्छील तसा हेरफेर करण्यांस समर्थ आहेत. अल्लाहतआलाने सुद्धा मुसलमानांच्या या कृत्याला मान्यता दिली. आणि यहूद्यांच्या अपमानाचे साधन ठरविले.
१०) 'बनु नजीर' चा इलाखा, जो मुसलमानांच्या कब्ज्यात आला, मदीनेपासून तीन चार मैलांच्या अंतरावर होता. म्हणजे मुसलमानांना याच्यासाठी लांब प्रवास करण्याची आवश्यकता पडली नाही. म्हणजे याच्यांत मुसलमानांना उंट आणि घोडे पळवावे लागले नाही. अशाच प्रकारे लढण्याची पण वेळ आली नाही. आणि तहा मार्फत या इलाख्यावर विजय मिळाला; म्हणजे अल्लाहने आपल्या पैगंबराला लढल्याशिवाय त्यांच्यावर प्रबळ करून दिले. म्हणून येथून प्राप्त होणाऱ्या संपत्तीला 'फय्' ठरविण्यांत आले. ज्याचा हुकूम 'गनीमत' हून वेगळा आहे. 'गनीमत' चा हुकूम हा आहे की, त्याचे पांच भाग केले जातील. चार भाग लढणाऱ्यांमध्ये (मुजाहिदीन) वाटले जातील; आणि पांचवा भाग अल्लाह आणि रसूलसाठी, म्हणजे मुसलमानांच्या बैतुलमाल करीतांआहे. परंतु 'फय्' ची संपत्ती ही लढणाऱ्यांमध्ये वाटली जाणार नाही. सर्वच्या सर्व संपत्ती ही अल्लाह आणि रसूलचा हिस्सा आहे. म्हणजे मुसलमानांच्या बैतुलमाल मध्ये जमा केली जाईल. या महावाक्यात येथे 'फय्' संपत्तीचा हाच उपयोग सांगितला गेला आहे.

مَآ اَفَآءَ اللّٰهُ عَلٰی رَسُوْلِهٖ مِنْ اَهْلِ الْقُرٰی فَلِلّٰهِ
وَلِلرَّسُوْلِ وَلِذِی الْقُرْبٰی وَالْیَتٰمٰی وَالْمَسٰكِیْنِ
وَابْنِ السَّبِیْلِ ۙ كَیْ لَا یَكُوْنَ دُوْلَةًۢ بَیْنَ الْاَغْنِیَآءِ
مِنْكُمْ ؕ وَمَآ اٰتٰىكُمُ الرَّسُوْلُ فَخُذُوْهُ ۚ وَمَا نَهٰىكُمْ عَنْهُ
فَانْتَهُوْا ۚ وَاتَّقُوا اللّٰهَ ؕ اِنَّ اللّٰهَ شَدِیْدُ الْعِقَابِ ۟ (٧)

**वस्तीवाल्यांची जी (मालमत्ता) अल्लाहतआला तुमच्या लढण्याशिवाय, आपल्या पैगंबराच्या हाती सोपवतो, ती अल्लाहची आहे आणि पैगंबराची आणि (पैगंबराच्या) नातलगांची आणि अनाथ बालकांची गोरगरीबांची आणि प्रवाशांची आहे. (१) यासाठी की, तुमच्यातील श्रीमंत लोकांच्या हातांतच ही मालमत्ता राहून न जावी (२) आणि तुम्हास जे काही पैगंबर देईल, ते घेऊन घ्या. आणि ज्यापासून मना करेल, त्यापासून फटकून रहा. (३) आणि अल्लाहतआलाला भीत रहा. खचित्‌च अल्लाहतआला कडक शिक्षा करणारा आहे. (७)**

لِلْفُقَرَآءِ الْمُهٰجِرِیْنَ الَّذِیْنَ اُخْرِجُوْا مِنْ دِیَارِهِمْ
وَاَمْوَالِهِمْ یَبْتَغُوْنَ فَضْلًا مِّنَ اللّٰهِ وَرِضْوَانًا
وَّیَنْصُرُوْنَ اللّٰهَ وَرَسُوْلَهٗ ؕ اُولٰٓىِٕكَ هُمُ الصّٰدِقُوْنَ ۟ (٨)

**('फय्‌' ची संपत्ती) त्या गरीब 'मुहाजिरीन' करीता आहे, जे आपल्या घरांतून आणि आपल्या मालमत्तेतून हुसकावून दिले गेले आहेत. ते अल्लाहची कृपा आणि त्याच्या सुप्रसन्नतेचे इच्छुक आहे आणि अल्लाहतआलाची आणि त्याच्या पैगंबराची मदत करतात. हेच खरे लोक आहेत. (४) (८)**

وَالَّذِیْنَ تَبَوَّؤُ الدَّارَ وَالْاِیْمَانَ مِنْ قَبْلِهِمْ یُحِبُّوْنَ
مَنْ هَاجَرَ اِلَیْهِمْ وَلَا یَجِدُوْنَ فِیْ صُدُوْرِهِمْ حَاجَةً
مِّمَّاۤ اُوْتُوْا وَیُؤْثِرُوْنَ عَلٰۤی اَنْفُسِهِمْ وَلَوْ كَانَ بِهِمْ
خَصَاصَةٌ ؕ۫ وَمَنْ یُّوْقَ شُحَّ نَفْسِهٖ فَاُولٰٓىِٕكَ هُمُ
الْمُفْلِحُوْنَ ۟ (٩)

**आणि (त्यांच्याकरीता) ज्यांनी या घरांत (म्हणजे मदीनेत) आणि ईमानांत त्यांच्यापूर्वी जागा बनवून घेतली आहे; (५) आपल्याकडे स्वदेश त्याग करुन येणाऱ्यांशी प्रेम करतात; आणि 'मुहाजिरीन' ला जे काही देऊन दिले जाईल. त्यामुळे आपल्या मनांत काही, अपेक्षा ठेवत नाही; (२) किंबहुना स्वत: आपल्यावर त्यांना प्राधान्य देतात, जरी स्वत:ला कितीका सक्त आवश्यकता असेना! (६) (गोष्ट ही आहे की) जो पण आपल्या मनाच्या लोभा पासून वांचला, तोच सफल झाला. (७) (९)**

وَالَّذِیْنَ جَآءُوْ مِنْ بَعْدِهِمْ یَقُوْلُوْنَ رَبَّنَا اغْفِرْ لَنَا
وَلِاِخْوَانِنَا الَّذِیْنَ سَبَقُوْنَا بِالْاِیْمَانِ وَلَا تَجْعَلْ فِیْ
قُلُوْبِنَا غِلًّا لِّلَّذِیْنَ اٰمَنُوْا رَبَّنَاۤ اِنَّكَ رَءُوْفٌ رَّحِیْمٌ ۟ (١٠)

**आणि त्यांच्याकरीता जे त्यांच्यानंतर आले, जे म्हणतात की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला क्षमा कर! आणि आमच्या त्या भावांना सुद्धा, जे आमच्यापूर्वी ईमान आणून चुकले आहेत; आणि ईमानवाल्यांच्याकडून आमच्या मनांत चुरस आणि (शत्रुत्व) टाकूं नकोस. (८) हे आमच्या पालनकर्त्या नि:संशय! तू फारच करूणामय आणि दयाळूंआहेस (१०)**

१) हे वारंवार सांगणे ताकीद करण्यासाठी आहे. परंतु याच्याबरोबरच 'फय्‌' च्या संपत्तीचा व्यय पण सांगून देण्यांत आला आहे. आणि येथे 'मिन्‌हुम्‌' ला मिन्‌ अहलील कुरा बदलून हे स्पष्ट करून देण्यांत आले की, हा हुकूम फक्त बनु नजीरच्या संपत्तीसाठीच नाही, किंबहुना जेव्हांकधी, आणि जेथे कोठे पण असा प्रकार होईल, याचा हुकूम राहील, उद्देश्य रसूलुल्लाह ﷺ आणि आपल्या नातलगांचा उल्लेख आहे. ज्याने बनु हाशिम आणि बनु मुत्तलिब अभिप्रेत आहेत. म्हणून हदीसमध्ये येते की, रसूलुल्लाह ﷺ, याच्यात आपल्या पवित्र पत्नीसाठी वर्षभराचा खर्च वसूल करीत आणि बाकी संपत्ती युद्धाची हत्यारे खरेदी करण्यासाठी आणि जिहादची तयारी करण्यामध्ये खर्च करीत असत. (स.बुखारी)

२) 'दुल्तन' त्या वस्तुला म्हणतात जी थोड्याच लोकांत फिरत रहात; त्यांच्यातून बाहेर पडत नाही. ही फयच्या संपत्तीचा खर्च करण्याची सबब सांगितली की, इला लढणाऱ्यांमध्ये वाटून देण्याऐवजी, बैतुलमालचा हक्क यासाठी ठरविण्यांत आला आहे की, ही संपत्ती श्रीमंत लोकांतच फिरत राहू नये. किंबहुना समाजातील गरजवंत लोकांनी यापासून लाभान्वयीत व्हावे.

३) येथे हा हुकूम जरी 'फय्‌' च्या संपत्तीच्या संदर्भात आला आहे, ज्याचा उद्देश्य मुसलमानांच्या मनांत, पैगंबरांचे आज्ञापालनाचे महत्त्व पटवून देणे आहे की, जो माल ते तुम्हास देतील, तो मान्य करून घ्या. आणि ज्यापासून मना करतील, त्यापासून थांबून जा. यावर आपल्या मनांत संकोच बाळगू नका. परंतु हा हुकूम सर्वसाधारण आहे. रसूल जो

पण हुकूम देईल, त्यावर अंमलबजावणी करा. आणि ज्या कामापासून मना करेल त्याच्याजवळ पण फटकू नका! यासाठी की, अल्लाहतआलाने जे पण धर्मशास्त्रीय आदेश आम्हास दिले आहेत, ते पैगंबरांच्या मार्फतच दिले आहेत. म्हणून पैगंबरांच्या आज्ञापालनाशिवाय शरिअतवर अंमलबजावणी करणे शक्य नाही. सहीह हदीसमध्ये एक घटना वर्णन केली गेली आहे ह. अब्दुल्लाह् बिन मसऊद ﷺ नी एकदा सांगितले, अल्लाहतआला त्या स्त्रियांना शाप देतो, ज्या गोंधतील, आणि गोंधून घेतील. ज्या आपल्या कपाळाचे केस ओढतील आणि जी सुंदरतेसाठी आपल्या समोरील दातांना फय करेल. एका स्त्रीला ही गोष्ट समजली, तेव्हा ती ह. अब्दुल्लाह बिन मसऊदजवळ आली; आणि म्हणाली की, मी ऐकले आहे की, आपण अमुक अमुक स्त्रीला शाप दिला आहे. त्यांनी सांगितले होय! बरोबर आहे, ज्यांच्यावर अल्लाहच्या पैगंबराने शाप दिला आहे, आणि जे अल्लाहच्या पुस्तकांत पण आहे मी त्यांना शाप का देऊ नये? ती स्त्री म्हणाली मला तर साऱ्या कुरआनांत हा शाप आढळून आला नाही. आपण फर्माविले, जर तू समजून वांचले असते; तर खचित्‌च तुला ही गोष्ट आढळून आली असती. काय तू हे महावाक्य वांचले नाही, ''जे पैगंबर तुम्हास देईल ते घेऊन घ्या आणि ज्या गोर्ष्टीपासून मना करेल ती करू नका.'' ती स्त्री म्हणाली होय! हे महावाक्य तर आहे. आपण फर्माविले, बस! अल्लाहच्या पैगंबराने त्या गोर्ष्टींपासून मना केले आहे, ज्या स्त्रिया करतात. (स.बुखारी) म्हणजे ह.इब्ने मसऊद ﷺ नी पैगंबराच्या हुकूमाला, ऐन अल्लाह्चा हुकूम ठरविला.

४) याच्यांत 'फय्' च्या संपत्तीचा अगदी योग्य व्यय सांगण्यांत आला आहे. आणि त्याचबरोबर 'मुहाजिरीन' चे श्रेष्ठत्व. त्यांचा प्रांजळपणा आणि अगदी योग्य तेच बोलणे याचा खुलासा आहे. ज्याच्यानंतर ईमानांत शंका घेणे, जणू कुरआनाला नाकारणे आहे.

४) याच्याने मदीनेचे अन्सार अभिप्रेत आहेत. जे मुहाजिरीनच्या मदीनेला येण्यापूर्वी मदीनेत राहत होते आणि मुहाजिरीनच्या स्वदेश त्याग करून येण्यापूर्वी ईमानपण त्यांचे मनांत घर करून चुकले होते. हा अर्थ नाही की, मुहाजिरीनच्या ईमान आणण्यापूर्वी, हे अन्सार ईमान आणून चुकले होते. कारण की, याच्या बहुसंख्येने मुहाजिरीनच्या ईमान आणल्यानंतर, ईमान आणले आहे.

५) म्हणजे मुहाजिरीनला अल्लाहचा पैगंबर जे काही देईल, त्यात चुरस आणि द्वेष त्यांना वाटत नाही. जसे 'फय्' च्या संपत्तीला प्रथमपात्र पण त्यांनाच ठरवले गेले. परंतु अन्सारांना वाईट वाटले नाही.

६) म्हणजे आपल्या तुलनेत मुहाजिरांच्या आवश्यकतेला प्राधान्य देतात. स्वत: उपाशी राहतात, परंतु मुहाजिरींना खाऊ घालतात. जसे हदीसमध्ये एक घटना येते की, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या जवळ एक पाहुणा आला, परंतु आपल्या घरांत काही नव्हते; म्हणून एक अन्सारी त्याला आपल्या घरी घेऊन गेला. घरी जाऊन पत्नीला सांगितले, तेव्हा पत्नी म्हणाली की घरांत फक्त मुलांपुरते खाद्य आहे. त्यांनी आपसांत सल्लामसलत केली की, मुलांना तर आज उपाशी झोपवूंन द्यावे; आणि आम्ही स्वत: सुद्धा काही खाल्ल्याशिवाय असेच झोपून जावे. अलबत्ता पाहुण्याला जेऊ घालतांना दिवा विझवून टाकावा. कारण की त्याला आमच्या बाबतीत काही कळूं नये की, आम्ही त्याच्याबरोबर जेवण करीत नाही. सकाळी जेव्हा ते सहाबी रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या सेवेत हजर झाले. तेव्हा आपण त्यांना फर्माविले की, अल्लाहतआलाने तुम्हा उभयंता पती पत्नीच्या सन्मानार्थ हे महावाक्य अवतरीत केले आहे. ''वयुअसिरून अला अन् फुसिहीम''..... हे महावाक्य (स.बुखारी, तफसीर सू.हश्र) त्यांच्या त्यागाचे हे पण फारच विचित्र उदाहरण आहे, की एका अन्सारीजवळ दोन पत्न्या होत्या. तर त्याने एका पत्नीला तलाक देण्याचे जाहीर केले की, इद्दत घालविल्यानंतर, तिच्याशी त्याच्या एका मुहाजीर भावाने लग्न करून घ्यावे. (स. बुखारी, किताबुन् निकाह)

७) हदीसमध्ये आहे ''शुह' (कृपणपणा) पांसून वांचा'' या जिवाच्या लोभा पूर्वींच्या लोकांस बर्बाद केले आहे. यानेच त्यांना रक्तपातावर उभारले. आणि त्यांनी हरामाला हलाल करून घेतले. (स.मुस्लिम)

८) हा 'फय्' च्या संपत्तीला पात्र असणाऱ्यांचा तिसरा प्रकार आहे. मग सहाबांच्या नंतर येणारे, आणि सहाबांच्या पावलावर पाऊला ठेवून चालणारे. याच्यांत ताबेईन आणि तबेताबेईन आणि कयामत पर्यंत होणारे ईमानवाले आणि ईशभय बाळगणारे येऊन गेले. परंतु अट हीच आहे की, ते अन्सार आणि मुहाजिरींना, ईमानवाले मानणारे आणि त्यांच्या बाबतीत क्षमायाचनेची प्रार्थना करणारे असावेत; न की, त्यांच्या ईमानांत शंका घेणारे, आणि त्यांच्यावर खोटे आळ आणि कुभांड रचणारे, आणि त्यांच्या विरूद्ध आपल्या मनांत, द्वेष आणि तिरस्कार बाळगणारे.

أَلَمْ تَرَ إِلَى الَّذِينَ نَافَقُوا يَقُولُونَ لِإِخْوَانِهِمُ
الَّذِينَ كَفَرُوا مِنْ أَهْلِ الْكِتَابِ لَئِنْ أُخْرِجْتُمْ
لَنَخْرُجَنَّ مَعَكُمْ وَلَا نُطِيعُ فِيكُمْ أَحَدًا أَبَدًا وَإِنْ
قُوتِلْتُمْ لَنَنْصُرَنَّكُمْ وَاللَّهُ يَشْهَدُ إِنَّهُمْ لَكَاذِبُونَ ﴿١١﴾

काय तू दांभिकांना पाहिले नाहीस? की आपल्या ग्रंथधारी काफिर भावांना म्हणतात जर तुम्ही हद्दपार केले गेले तर आवश्यच आम्ही सुद्धा तुमच्या बरोबर स्वदेश सोडून देऊ. आणि तुमच्या बाबतीत, आम्ही कधी सुद्धा, कोणाची गोष्ट ऐकणार नाही. आणि जर तुमच्याशी युद्ध केले जाईल, तर आम्ही अवश्यच तुमची मदद करू; (१) परंतु अल्लाहतआलाची साक्ष आहे की, हे बिल्कुल लबाड आहेत. (२) (११)

لَئِنْ أُخْرِجُوا لَا يَخْرُجُونَ مَعَهُمْ وَلَئِنْ قُوتِلُوا لَا
يَنْصُرُونَهُمْ وَلَئِنْ نَصَرُوهُمْ لَيُوَلُّنَّ الْأَدْبَارَ ثُمَّ
لَا يُنْصَرُونَ ﴿١٢﴾

जर ते हद्दपार केले गेले, तर हे त्यांच्या बरोबर जाणार नाहीत आणि जर त्यांच्याशी युद्ध छेडले गेले, तर ते त्यांची मदत पण करणार नाही. (३) आणि समजा जर मदतीला येऊन पोहचले, (४) तरी पाठ फिरवून (पळून जातील) (५) मग त्यांना (कुठूनही) मदत केली जाणार नाही (६) (१२)

لَأَنْتُمْ أَشَدُّ رَهْبَةً فِي صُدُورِهِمْ مِنَ اللَّهِ ذَٰلِكَ
بِأَنَّهُمْ قَوْمٌ لَا يَفْقَهُونَ ﴿١٣﴾

(मुसलमानांनो) तुमची हैबत, त्यांच्या मनांत (७) अल्लाहच्या हैबतीपेक्षा फारच जास्त आहे. यासाठी की हे लोक असमंजस आहेत. (८) (१३)

لَا يُقَاتِلُونَكُمْ جَمِيعًا إِلَّا فِي قُرًى مُحَصَّنَةٍ أَوْ مِنْ
وَرَاءِ جُدُرٍ بَأْسُهُمْ بَيْنَهُمْ شَدِيدٌ تَحْسَبُهُمْ جَمِيعًا
وَقُلُوبُهُمْ شَتَّىٰ ذَٰلِكَ بِأَنَّهُمْ قَوْمٌ لَا يَعْقِلُونَ ﴿١٤﴾

हे सर्व तुमच्याशी मिळून सुद्धा लढू शकत नाही. परंतु होय ! ही आणखी गोष्ट आहे की, ते किल्लेबंद जागेत असतील, (९) किंवा भिंतीच्या आड असतील. त्यांची लढाई; तर त्यांच्या आपसांत फारच सक्त आहे जरी (१०) आपण हे समजाल की हे सारे एक आहेत. परंतु त्यांची अंत:करणे वास्तविक एक दुसऱ्याशी दुभागलेली आहेत. (११) यासाठी की, या लोकांत बिल्कुल अक्कल नाही. (१२) (१४)

كَمَثَلِ الَّذِينَ مِنْ قَبْلِهِمْ قَرِيبًا ذَاقُوا وَبَالَ أَمْرِهِمْ
وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ﴿١٥﴾

त्या लोकांप्रमाणे जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत. ज्यांनी आपल्या कुकर्माची गोडी चाखून घेतली आहे (१३) आणि ज्यांच्यासाठी वेदनादायक शिक्षा तयार आहे. (१४) (१५)

كَمَثَلِ الشَّيْطَانِ إِذْ قَالَ لِلْإِنْسَانِ اكْفُرْ فَلَمَّا كَفَرَ
قَالَ إِنِّي بَرِيءٌ مِنْكَ إِنِّي أَخَافُ اللَّهَ رَبَّ الْعَالَمِينَ ﴿١٦﴾

शैतानासारखे की ज्याने माणसाला म्हटले कुफ्र कर! जेव्हा तो करून चुकला, तर म्हणू लागला, मी तर तुझ्यापासून अलीप्त आहे. (१५) मी तर अल्लाह जो सकल जगाचा पालनकर्ता, त्याला भितो (१६) (१६)

فَكَانَ عَاقِبَتَهُمَا أَنَّهُمَا فِي النَّارِ خَالِدَيْنِ فِيهَا وَذَٰلِكَ
جَزَاءُ الظَّالِمِينَ ﴿١٧﴾

तर उभयतांचा परिणाम हा झाला की, नरकाग्नीच्या उष्णतेत नेहमीसाठी गेले. ज़ालिमांची हीच शिक्षांआहे. (१७) (१७)

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا اتَّقُوا اللَّهَ وَلْتَنْظُرْ نَفْسٌ
مَا قَدَّمَتْ لِغَدٍ وَاتَّقُوا اللَّهَ إِنَّ اللَّهَ خَبِيرٌ بِمَا
تَعْمَلُونَ ﴿١٨﴾

हे ईमानवाल्यांनो! अल्लाहला भीत रहा. (१८) आणि प्रत्येक माणसाने या गोष्टीवर नजर ठेवावी की, उद्या (कयामत) करीता त्याने कर्मांचा काय सांठा करून ठेवला आहे. (१९) आणि नेहमी अल्लाहला भीत रहा. अल्लाह तुमच्या सर्व कर्मांशी माहितगार आहे. (२०) (१८)

وَلَا تَكُونُوا كَالَّذِينَ نَسُوا اللَّهَ فَأَنْسَاهُمْ أَنْفُسَهُمْ
أُولَٰئِكَ هُمُ الْفَاسِقُونَ ﴿١٩﴾

आणि त्या लोकांसारखे होऊ नका, ज्यांनी अल्लाह (च्या आदेशांना) विसरवून टाकले. तर अल्लाह ने सुद्धा असे करून टाकले की, ते आपल्या स्वत:ला विसरून गेले (२१) आणि असेच लोक आज्ञाभंजक असतात. (१९)

१) जसे पूर्वी येऊन चुकले आहे की दांभिकांनी बनु नजीरला संदेश पाठविला होता.

२) तात्पर्य त्यांची लबाडी स्पष्ट होऊन पुढे आली की बनु नजीरला हद्द पार करण्यांत आले परंतु हे त्यांच्या मदतीला पोहचले नाही न त्यांच्या तरफदारीत मदीना सोडण्याला तयार झालेत.

३) हा दांभिकांच्या मागील खोट्या वायद्यांचा आणखी तपशील आहे. तात्पर्य झालेही असेच ! बनु नजीर हद्दपार, बनु कुरैजा ठार, आणि कैदी केले गेले. परंतु दांभिक कोणाच्या मदतीला पोहचले नाहीत.

४) हे केवळ कर्तव्य म्हणून सांगितले जात आहे. नाहीतर ज्या गोष्टीचे खंडन अल्लाहतआला करून टाकेन, त्याचे अस्तित्व कसे शक्य आहे ? अर्थ आहे की जर हे यहूद्यांची मदत करण्याचा इरादा करतील.

५) म्हणजे हार खाऊन.
६) अभिप्रेत यहूदी आहेत. म्हणजे जेव्हा त्यांचे मददगार दांभिकच हार खाऊन पळून जातील, तर यहूदी कशाप्रकारे सफल होतील ? काहींनी याच्याने अभिप्रेत दांभिक घेतले आहे की, त्यांची मदत केली जाणार नाही. किंबहुना अल्लाह त्यांना अपमानित करेल. आणि त्यांचा दंभ त्यांच्यासाठी फायदेकारक होणार नाही.
७) यहुद्यांच्या किंवा दांभिकांच्या किंवा सर्वांच्याच अंत:करणात.
८) म्हणजे तुमचे हे भय, त्यांच्या अंत:करणांत त्यांच्या असमंजसपणामुळे आहे. नाही तर जर हे समजदार असते, तर हे समजून गेले असते की, मुसलमानांचे वर्चस्व आणि प्रबळता, अल्लाहतआलाकडून आहे. म्हणून भिणे, अल्लाहतआलाला पाहिजे न की मुसलमानांकरीता.
९) म्हणजे हे दांभिक लोक आणि यहूदी मिळून सुद्धा, खुल्या मैदानांत तुमच्याशी लढण्याची हिंमत ठेवीत नाही. तथापि किल्ल्यांत बंदीस्त होऊन किंवा भिंतीच्या मागे लपून तुमच्यावर वार करू शकतात. ज्याने हे स्पष्ट आहे की, हे फारच भित्रे आहेत. आणि तुमच्या हैबतीने भयभित आहेत.
१०) म्हणजे आपसांत एक दुसऱ्याच्या फारच विरुद्ध आहेत. म्हणजे यांच्या आपसांत तर भांडण आणि संघर्ष व फजिती सर्रास आहे.
११) ही दांभिकांची आपसांत अंत:करणाची ही स्थिती आहे. किंवा यहूदी आणि दांभिकांचा किंवा मुशरिक आणि ग्रंथधारींचा. अर्थ हा आहे की, सत्याच्या मुकाबल्यात, हे एक दिसतात. परंतु त्यांची अंत:करणे एक नाहीत. ती एक दुसऱ्यांपेक्षा वेगळी (आहेत.) आणि एक दुसऱ्याच्या विरुद्ध द्वेष आणि तिरस्काराने भरलेली.
१२) म्हणजे हा मतभेद आणि संघर्ष यांच्या बेअकलीमुळे आहे. जर यांच्याजवळ समजणारी अक्कल असती, तर त्यांनी सत्याला ओळखून घेतले असते. आणि त्याचा अंगिकार करून घेतला असता.
१३) याच्याने काहींनी मक्केचे मुशरिक लोक अभिप्रेत धरले आहेत. ज्यांनी बनु नजीरच्या युद्धापूर्वी काही काळ आधी बद्रच्या युद्धांत धडा घेण्यासारखी हार झाली होती. म्हणजे हे सुद्धा पराजीत आणि अपमानीत होण्यांत मुशरिकीन सारखेच आहेत. ज्यांचा काळ जवळच आहे. काहींनी यहुद्यांचे दुसरे घराणे 'बनु कयनुकाअ' अभिप्रेत धरले आहे. ज्यांना बनु नजीरच्या पूर्वी हद्दपार करून टाकण्यात आले होते. जे काळ आणि ठिकाण दोन्ही दृष्टीने त्यांच्या जवळ होते. (इब्ने कसीर)
१४) म्हणजे ही शिक्षा ज्याची त्यांनी गोडी चाखली, ही तर या जगांतील शिक्षा आहे. परलोकांतील शिक्षा याच्याशिवाय आहे जी फारच वेदनादायक असेल.
१५) हे यहूदी आणि दांभिक लोकांचे एक आणखी उदाहरण सांगितले की, दांभिकांनी यहूद्यांना अशा प्रकारे वाऱ्यांवर सोडून दिले, ज्याप्रमाणे शैतान माणसाबरोबर मामला करतो. पहिले तो माणसाला बहकवितो आणि जेव्हा मनुष्य शैतानाच्या मागे लागून कुफ्र करून बसतो. तेव्हांशैतान त्याच्यापासून अलिप्त असल्याचे जाहीर करून टाकतो.
१६) शैतान आपल्या या म्हणण्यांत खरा नाही. उद्देश्य फक्त त्या कुफ्रपासून अलिप्तता आणि निर्दोषत्व दाखविणे आहे, जे मनुष्य शैतानाच्या बहकविण्यापासून करतो.
१७) म्हणजे जहन्नमची कायमची शिक्षा.
१८) ईमानवाल्यांना संबोधित करून, त्यांना उपदेश केला जात आहे. अल्लाहला भिण्याचा अर्थ आहे, त्याने त्या गोष्टींना करण्याचा हुकूम दिला आहे, त्यावर अंमलबजावणी करा. ज्यापासून मना केले आहे, त्यापासून थांबून जा. महावाक्यांत हे ताकीद म्हणून दोनदा फर्माविले कारण की हा 'तकवा' (अल्लाहचे भय) च मनुष्याला पुण्य करण्याला आणि पापापासून वांचण्याला तयार करते.
१९) उद्याने अभिप्रेत कयामत आहे. त्याला 'उद्या' ने संबोधित करून, याकडेपण इशारा केला की, तिचे घडून येणे फार दूर नाही, जवळच आहे.
२०) म्हणून तो प्रत्येकाला त्याच्या कर्माचा मोबदला देईल, पुण्यवानाला पुण्याचे प्रतिफळ आणि पाप्याला पापाचे प्रतिफळ.
२१) म्हणजे अल्लाहने त्यांना कर्माच्या बदली असे करून दिले की, ते अशा कर्मांकडून गाफिल होऊन गेले, ज्यांत त्यांचा फायदा होता. आणि ज्यांच्या मार्फत ते आपल्या जिवांना अल्लाहच्या शिक्षेकडून वांचवू शकले असते. अशाप्रकारे मनुष्य अल्लाहला विसरून जाण्याने, स्वत:ला विसरून जाण्यापर्यंत पोहचून जातो. त्याची बुद्धी त्याचे योग्य मार्गदर्शन करीत नाही. डोळे त्याला सत्याचा मार्ग दाखवित नाही. आणि त्याचे कान सत्य ऐकण्यापासून बहिरे होऊन जातात. परिणामी त्यांच्यापासून अशी कामे होऊन जातात, ज्यामुळे त्याची स्वत:ची बर्बादी होऊन जाते.

لَا يَسْتَوِيٓ أَصْحَٰبُ ٱلنَّارِ وَأَصْحَٰبُ ٱلْجَنَّةِ ۚ أَصْحَٰبُ ٱلْجَنَّةِ هُمُ ٱلْفَآئِزُونَ ﴿٢٠﴾

**अग्नीवाले आणि स्वर्गावाले बरोबर नाहीत. (१) जे स्वर्गवाले आहेत, तेच सफल आहेत. (आणि जे आगवाले आहेत तेच असफल (२) आहेत) ⑳**

لَوْ أَنزَلْنَا هَٰذَا ٱلْقُرْءَانَ عَلَىٰ جَبَلٍ لَّرَأَيْتَهُۥ خَٰشِعًا مُّتَصَدِّعًا مِّنْ خَشْيَةِ ٱللَّهِ ۚ وَتِلْكَ ٱلْأَمْثَٰلُ نَضْرِبُهَا لِلنَّاسِ لَعَلَّهُمْ يَتَفَكَّرُونَ ﴿٢١﴾

**जर आम्ही या कुरआनाला कोण्या पर्वतावर उतारतो, (३) तर तू पाहिले असते की ईशभयाने तो नमून तुकडे तुकडे होऊन गेला असता. (४) आम्ही या उदाहरणांना लोकांच्या समोर वर्णन करतो, की त्यांनी (यावर) चिंतन आणि मनन करावे. (५) ㉑**

هُوَ ٱللَّهُ ٱلَّذِي لَآ إِلَٰهَ إِلَّا هُوَ ۖ عَٰلِمُ ٱلْغَيْبِ وَٱلشَّهَٰدَةِ ۖ هُوَ ٱلرَّحْمَٰنُ ٱلرَّحِيمُ ﴿٢٢﴾

**तोच अल्लाह आहे, ज्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही; गुप्त (६) आणि उघड गोष्टींना जाणणारा, तोच परम दयाळू आणि कृपाळू आहे. ㉒**

هُوَ ٱللَّهُ ٱلَّذِي لَآ إِلَٰهَ إِلَّا هُوَ ٱلْمَلِكُ ٱلْقُدُّوسُ ٱلسَّلَٰمُ ٱلْمُؤْمِنُ ٱلْمُهَيْمِنُ ٱلْعَزِيزُ ٱلْجَبَّارُ ٱلْمُتَكَبِّرُ ۚ سُبْحَٰنَ ٱللَّهِ عَمَّا يُشْرِكُونَ ﴿٢٣﴾

**तोच अल्लाह आहे ज्याच्या वाचून अन्य कोणी उपास्य नाही. बादशाह, परम पवित्र सर्व दोषांपासून पवित्र, अभयदायक, संरक्षणकर्ता, परम समर्थ, प्रतापशाली, महिमाशाली आहे, पवित्र आहे अल्लाह त्या गोष्टींपासून ज्यांना हे त्याचा सरकतदार ठरवित असतात. ㉓**

१) ज्यांनी अल्लाहला विसरून ही गोष्टपण विसरून गेले की, अशाप्रकारे ते स्वत:च आपल्या जिवावर जुलूम करीत आहे. आणि एक दिवस येईल की, परिणामांत, त्यांची ही शरीरे, ज्यांच्याकरीता जगांत हे अतोनात कष्ट करीत होते. जहन्नमच्या अग्नीचे हे इंधन बनतील. आणि यांच्या तुलनेत, दुसरे ते लोक होते, ज्यांनी अल्लाहला लक्षांत ठेवले, त्याच्या आदेशांप्रमाणे जीवन घालविले. एक वेळ येईल की, अल्लाह त्यांना याचा उत्कृष्ट मोबदला देईन. आणि आपल्या स्वर्गांत त्यांना दाखल करील. जेथे त्यांच्या आरामा आणि सुखाकरीता, सर्व प्रकारच्या देणग्या आणि सवलती असतील. हे दोन्ही पक्ष म्हणजे स्वर्गवासी आणि नर्कवासी समान असणार नाहीत. बरे! हे समान पण कसे असू शकतात? एकाने आपल्या परीणामांकडे लक्ष ठेवले, आणि त्याच्याकरीता तयारी करीत राहिला. दुसरा आपल्या परीणामांकडून गाफील राहिला. म्हणून त्याच्याकरीतां, त्याच्या तयारीमध्ये अपराधिकपणे गाफील राहिला.

२) म्हणजे ज्याप्रमाणे परीक्षेची तयारी करणारा सफल, आणि दुसरा असफल राहतो, अशाच प्रकारे ईमान आणि ईशभयवाले, स्वर्गप्राप्तीत यशस्वी होऊन जातील. कारण की ते याच्यासाठी जगात पुण्यकर्मे करून, तयारी करीत राहिले. जणू हे जग कर्म करण्याचे ठिकाण आणि परीक्षेचे ठिकाण आहे. ज्याने या वास्तविकतेला जाणून घेतले आणि त्याने परीणामाकडे दुर्लक्ष करून, जीवन घालविले नाही, तो सफल होईल. आणि जो जगाच्या वास्तविकतेला समजण्यापासून असमर्थ आणि परीणामापासून गाफील, आज्ञाभंजनात आणि निरर्थक गोष्टींत मग्न राहिला, तो घाट्यांत आणि अयशस्वी होईल.अल्लाहहुम्मा अजअलना मिनल् फाईजीन.

३) आणि पर्वतामध्ये, समज आणि जाणीवतेची ती योग्यता निर्माण करून देतो, जी आम्ही मनुष्यांत ठेवली आहे.

४) म्हणजे कुरआन करीममध्ये, साहित्य शैली व लालित्य, आणि उपदेश आणि चर्चा अशाप्रकारे चर्चिले गेले आहेत की, त्यांना ऐकून पर्वतसुद्धा इतके काठिण्य, आणि विशालता व उंची असून सुद्धा ईशभयाने चुरा चुरा होऊन गेला असतां. हे मनुष्याला समजाविले आणि भिवविले जात आहे की, तुला बुद्धी आणि जाणीवांच्या क्षमता दिल्या गेल्या आहेत. परंतु जर कुरआन ऐकून तुझ्या मनावर काही परीणाम होत नाही, तर तुझा परीणाम चांगला होणार नाही.

५) कारण की कुरआनाच्या उपदेशांनी त्याने धडा घ्यावा; आणि परीणामांना ऐकून आज्ञाभंगापासून त्याने वांचावे. काही म्हणतात की, या महावाक्यांत नबी ﷺ ला संबोधन आहे की, आम्ही आपणांवर हे कुरआन मजीद अवतीर्ण केले आहे. ते इतके अजीमुश्शान आहे की, जर आम्ही त्यांस कोण्या पर्वतावर अवतीर्ण केले असते तर तो चुरा चुरा होऊन गेला असतां; परंतु हा आमचा तुमच्यावर उपकार आहे की, आम्ही तुम्हास इतके शक्तीमान आणि मजबूत करून दिले की तुम्ही त्या गोष्टीला सहन करून घेतले, जिला सहन करण्याची पर्वतांत सुद्धा शक्ती नाही. (फतहुल कदीर) याच्यानंतर अल्लाहतआला आपली वैशिष्ट्ये वर्णन करीत आहे. ज्याचा उद्देश्य एकेश्वरवादाची भक्कमता आणि शिर्कचे खंडन आहे.

६) अदृष्ट, सृष्टीच्या अनुषंगाने आहे; नाहीतर अल्लाहसाठी तर कुठलीही वस्तू अदृष्ट नाही. अर्थ हा आहे की, तो विश्वाची प्रत्येक वस्तू जाणतो. मग ती आमच्यासमोर असो किंवा आमच्यापासून अदृष्ट असो. येथपावेतो की, तो अंधारात चालणाऱ्या मुंगीला सुद्धा जाणतो.

هُوَ اللّٰهُ الْخَالِقُ الْبَارِئُ الْمُصَوِّرُ لَهُ الْاَسْمَآءُ
الْحُسْنٰى ؕ يُسَبِّحُ لَهٗ مَا فِي السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۚ وَهُوَ
الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٢٤﴾

तोच अल्लाह आहे निर्माणकर्ता, अस्तित्व प्रदान करणारा, चेहरे बनविणारा; [१] त्याच्याच करीता सुंदर (सुंदर) नांवे आहेत. [२] प्रत्येक वस्तू मग ती आकाशांत असो वा पृथ्वीत त्याचे पावित्र्य वर्णन करते आहे [३] आणि तोच परमसमर्थ आणि बुद्धीमान आहे. [४] (२४)

آياتها ١٣ (٦٠) سُوْرَةُ الْمُمْتَحِنَةِ مَدَنِيَّةٌ (٩١) رکوعاتها ٢

## महावाक्ये १३ — (६०) सू. मुम्तहिन: — रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَتَّخِذُوْا عَدُوِّيْ وَعَدُوَّكُمْ
اَوْلِيَآءَ تُلْقُوْنَ اِلَيْهِمْ بِالْمَوَدَّةِ وَقَدْ كَفَرُوْا بِمَا
جَآءَكُمْ مِّنَ الْحَقِّ ۚ يُخْرِجُوْنَ الرَّسُوْلَ وَاِيَّاكُمْ
اَنْ تُؤْمِنُوْا بِاللّٰهِ رَبِّكُمْ ؕ اِنْ كُنْتُمْ خَرَجْتُمْ جِهَادًا فِيْ
سَبِيْلِيْ وَابْتِغَآءَ مَرْضَاتِيْ تُسِرُّوْنَ اِلَيْهِمْ بِالْمَوَدَّةِ ۖ
وَاَنَا اَعْلَمُ بِمَاۤ اَخْفَيْتُمْ وَمَاۤ اَعْلَنْتُمْ ؕ وَمَنْ يَّفْعَلْهُ
مِنْكُمْ فَقَدْ ضَلَّ سَوَآءَ السَّبِيْلِ ﴿١﴾

अहो त्या त्या लोकांनो! ज्यांनी ईमान आणले आहे, माझ्या आणि स्वत: आपल्या शत्रूंना, आपला मित्र बनवू नका. [५] तुम्ही तर प्रेमाने त्यांच्या कडे संदेश पाठवितात. [६] आणि ते या सत्याबरोबर, जे तुमच्याजवळ येऊन चुकले आहे, कुफ्र करतात. पैगंबरांना (सल्ल.) आणि स्वत: तुम्हांस देखील केवळ या कारणाने आपल्या भूमीतून काढून लावतात की, तुम्ही आपल्या पालनकर्त्यावर ईमान ठेवतात. [७] जर तुम्ही माझ्या मार्गात, जिहादमध्ये आणि माझ्या सुप्रसन्नतेच्या अभिलाषेत निघतात (तर त्यांच्याशी मैत्री करू नका.) [८] तुम्ही त्यांच्याजवळ प्रेमाचा संदेश गुप्तपणे पाठवतात आणि मला खूप ठाऊक आहे, जे तुम्ही लपविले, आणि ते सुद्धा जे तुम्ही जाहीर केले. तुमच्यातून जो पण या कामाला करील, तो खचित्‌च सरळ मार्गाहून भटकून जाईल. [९] (१)

اِنْ يَّثْقَفُوْكُمْ يَكُوْنُوْا لَكُمْ اَعْدَآءً وَّيَبْسُطُوْۤا اِلَيْكُمْ
اَيْدِيَهُمْ وَاَلْسِنَتَهُمْ بِالسُّوْٓءِ وَوَدُّوْا لَوْ تَكْفُرُوْنَ ﴿٢﴾

जर त्यांना तुमच्यावर वर्चस्वाची संधी मिळून जाईल, तर ते तुमचे (उघड) शत्रु होऊन जातील. आणि दुष्ट बुद्धीने, तुमच्यावर आपले हात आणि आपल्या जिभा वाढवतील आणि (मनांत) इच्छितील की, तुम्ही सुद्धा कुफ्र करू लागावे. [१०] (२)

لَنْ تَنْفَعَكُمْ اَرْحَامُكُمْ وَلَاۤ اَوْلَادُكُمْ ۚۛ يَوْمَ الْقِيٰمَةِ ۚۛ يَفْصِلُ
بَيْنَكُمْ ؕ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ﴿٣﴾

तुमचे गोत्र संबंध आणि नातेसंबंध, आणि संतती, तुम्हाला कयामतच्या दिवशी काही कामा येणार नाही [११] तो (अल्लाहतआला) तुम्हांस फैसला करून टाकीन; [१२] आणि जे काही तुम्ही करीत आहांत, त्याला अल्लाहतआला खूप पहात आहे. (३)

قَدْ كَانَتْ لَكُمْ اُسْوَةٌ حَسَنَةٌ فِيْۤ اِبْرٰهِيْمَ وَالَّذِيْنَ
مَعَهٗ ۚ اِذْ قَالُوْا لِقَوْمِهِمْ اِنَّا بُرَءٰٓؤُا مِنْكُمْ
وَمِمَّا تَعْبُدُوْنَ مِنْ دُوْنِ اللّٰهِ ؗ كَفَرْنَا بِكُمْ وَبَدَا
بَيْنَنَا وَبَيْنَكُمُ الْعَدَاوَةُ وَالْبَغْضَآءُ اَبَدًا حَتّٰى
تُؤْمِنُوْا بِاللّٰهِ وَحْدَهٗۤ اِلَّا قَوْلَ اِبْرٰهِيْمَ لِاَبِيْهِ
لَاَسْتَغْفِرَنَّ لَكَ وَمَاۤ اَمْلِكُ لَكَ مِنَ اللّٰهِ مِنْ شَيْءٍ ؕ
رَبَّنَا عَلَيْكَ تَوَكَّلْنَا وَاِلَيْكَ اَنَبْنَا وَاِلَيْكَ الْمَصِيْرُ ﴿٤﴾

(मुसलमानांनो!) तुमच्याकरीता ह.इब्राहीममध्ये आणि त्यांच्या साथीदारांमध्ये उत्कृष्ट नमुना [१३] आहे. जेव्हा की त्या सर्वांनी आपल्या लोकांना खुल्लम खुल्ला सांगून टाकले की, आम्ही तुम्हापासून आणि ज्यांची ज्यांची तुम्ही अल्लाहच्याशिवाय उपासना करता, त्या सर्वांकडून बिल्कुल अलिप्त आहोत. [१४] आम्ही तुमच्या (धारणेचे) नाकारणारे आहोत. जो पर्यंत तुम्ही एकच अल्लाहवर ईमान आणणार नाहीत, आमच्या आणि तुमच्या दर्म्यान नेहमीकरीता द्वेष आणि अदावत उघड होऊन गेली. [१५] परंतु इब्राहीम (अ.) ची आपल्या बापाबरोबर एवढी गोष्ट तर झाली होती [१६] की मी तुमच्याकरीता, क्षमेची प्रार्थना अवश्य करीन. आणि तुमच्याकरीता मला अल्लाहच्या समोर कुठल्याही गोष्टीचा काहीही अधिकार नाही. हे आमच्या पालनकर्त्या! तुझ्यावरच आम्ही भरवसा केला आहे. [१७] आणि तुझ्याकडे आम्ही वळतो आणि तुझ्याचकडे परतून जाणे आहे. (४)

१) असे म्हणतात की, 'खलक' चा अर्थ आपल्या इराद्या आणि इच्छेनुसार अंदाज करणे आणि 'बराअ' चा अर्थ आहे, त्याला निर्माण करणे, घडविणे, अस्तित्वांत आणणे.

२) अल्लाहच्या उत्कृष्ट नांवावर (अस्मा-ए-हुस्ना) चर्चा. सू.आअराफ आ.१८० मध्ये येऊन चुकले आहे.

३) स्थितीने सुद्धाआणि संभाषणाने सुद्धा, जसे की पूर्वी सांगण्यांत आले.

४) ज्या गोष्टीचा पण तो निर्णय करतो ती शहाणपणाने खाली नसते.

५) मक्केचे काफिर आणि नबी ﷺ यांच्या दर्म्यान हुदैबियामध्ये जो तह झाला होता, मक्कावाल्यांनी याच्या विरुद्ध

वर्तन केले. म्हणून रसूलुल्लाह् ﷺ नी सुद्धा मुसलमानांना गुप्तपणे युद्धाची तयारी करण्याचा हुकूम देऊन टाकला. हजरत हातिब बिन अबी बलतआ رضي الله عنه एक महाजीर बद्रि सहाबी होते. ज्यांचे कुरैश बरोबर काही नाते संबंध नव्हते. परंतु त्यांची पत्नी आणि मुले बाळे मक्केतच होते. त्यांनी विचार केला की, मी मक्केच्या कुरैशला आपण ﷺ च्या तयारीची सूचना द्यावी. कारण की, या उपकाराच्या बदल्यात त्यांनी माझ्या पत्नी व मुलाबाळांचा विचार ठेवावा. म्हणून त्यांनी एका स्त्रीच्या मार्फत हा संदेश लेखी स्वरुपांत मक्कावाल्यांकडे रवाना करून दिला. ज्याची सूचना वह्यामार्फत नबी ﷺ ला दिली गेली. म्हणून आपण ﷺ नी ह.अली, ह.मिकदाद, आणि ह.जुबैर رضي الله عنه ला फर्माविले की जा!रौजए खाक वर एक स्त्री असेल, जी मक्केला जात असेल, तिच्याजवळ एक पत्र आहे; ते घेऊन या! म्हणून ते लोक गेलेत, आणि तिच्या जवळून हे पत्र घेऊन आलेत. जे तिने डोक्यातील केसांत लपवून ठेवले होते. आपण ﷺ नी ह.हातिब رضي الله عنه ला विचारले, हे तुम्ही काय केले? त्यांनी सांगितले की, हे काम मी कुफ्र आणि इस्लामकडून फिरून जाण्यामुळे केले नाही. किंबहुना याचे कारण फक्त हे आहे की, दुसऱ्या महाजिरीनचे नातेवाईक मक्केत उपस्थित आहेत. जे त्यांच्या पोरा बाळांचे संरक्षण करतात. माझा तेथे कोणी नातेवाईक नाही. म्हणून मी विचार केला की, मक्कावाल्यांना मी काही सूचित करून द्यावे. कारण ते माझ्या उपकाराखाली रहावेत, आणि मुलाबाळांचे त्यांनी संरक्षण करावे. आणि आपण ﷺ नी त्यांच्या खरे सांगण्याने त्यांना काहीही म्हटले नाही. तथापि अल्लाहतआलाने तंबी म्हणून हे महावाक्य अवतरीत केले; कारण की, याच्यापुढे कोण्या ईमानवाल्याने कोण्या काफिरांबरोबर अशाप्रकारचा संबंध प्रस्तापित करू नये. (स.बुखारी)

६) अर्थ आहे नबी ﷺ च्या बातम्या, त्यांच्या पर्यंत पोहचवून त्यांच्याशी मैत्रीपूर्ण संबंध कायम करू इच्छिता?

७) जेव्हा त्यांचा तुमचा संबंध आणि सत्त्याबरोबर हा मामला आहे तर तुमच्या करीता काय हे योग्य आहे की, तुम्ही त्यांच्याशी आणि सहानुभूतीची वागणुक अंगीकारावी?

८) हे अटीचे उत्तर, चे भाषांतर आहे.

९) म्हणजे माझ्या आणि आपल्या शत्रुंशी, प्रेमाचा संबंध जोडणे आणि त्यांना गुप्त पत्र पाठविणे आणि संदेश पाठविणे, हा आडमार्गी भटकण्याचा मार्ग आहे, जो कोण्या मुसलमानाला शोभत नाही.

१०) म्हणजे तुमच्या विरुद्ध त्यांच्या मनात तर अशा प्रकारे द्वेष आणि तिरस्कार आहे, आणि तुम्ही आहात की, त्यांच्याबरोबर प्रेमाचे संबंध जोडू इच्छिता?

११) म्हणजे ज्या संततीसाठी, तुम्ही काफिरांशी प्रेम प्रदर्शित करीत आहात, ती तुमच्या काही कामा येणार नाही. मग त्यांच्यामुळे तुम्ही काफिरांशी मैत्री करून अल्लाहला का नाराज करता? कयामतच्या दिवशी जी गोष्ट कामा येईल, ते तर अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांचे आज्ञापालन आहे. त्याची काळजी करा.

१२) दुसरा अर्थ आहे, तुमच्या दर्म्यान विभक्त होणे टाकून देईल. म्हणजे आज्ञापालकांना स्वर्गात आणि गुन्हेगारांना नरकाग्नीत दाखल करील. काही म्हणतात आपसांत वेगळे होण्याचा अर्थ आहे की, एक दुसऱ्यापासून पळ काढतील. जसे फर्माविले, ''भयानकतेच्या तिव्रतेने भावापासून भाऊं पळ काढेल.'' (सू.अबस-३४)

१३) काफिरांशी संबंध तोडण्याच्या समस्येचे स्पष्टीकरण करण्यासाठी ह.इब्राहीम عليه السلام चे उदाहरण दिले जात आहे. 'उसव: चा अर्थ होतो, असा नमुना ज्याचे अनुकरण केले जावे.

१४) म्हणजे शिर्कमुळे आमचा आणि तुमचा काही संबंध नाही. अल्लाहच्या उपासकांचा अल्लाहशिवाय इतरांच्या पुजाऱ्यांशी काय बरे संबंध?

१५) म्हणजे हे वेगळे होणे आणि अलिप्तता, त्या वेळेपर्यंत राहील, जोपर्यंत तुम्ही कुफ्र व शिर्क सोडून तौहीद (एकेश्वरवादा) चा अंगीकार करणार नाही. पण होय! जेव्हा तुम्ही एका अल्लाहला मानणारे होऊन जाल, तेव्हा मग हे शत्रुत्व, मैत्रीत, आणि हा द्वेष प्रेमांत बदलून जाईल.

१६) अर्थ हा आहे की, ह. इब्राहीम عليه السلام चे संपूर्ण जीवन एक अनुकरण करण्या योग्य नमुना आहे. तथापि त्यांची आपल्या बापाकरीतां क्षमेची याचना करणे, एक असे कर्म आहे, ज्यांत त्यांचे अनुकरण न केले जावे. कारण की त्यांचे हे काम त्या वेळेचे आहे, जेव्हा त्यांना आपल्या बापाबद्दल ज्ञान नव्हते. म्हणून जेव्हा त्यांचेवर हे स्पष्ट होऊन गेले की, त्यांचा बाप अल्लाहचा शत्रू आहे. तेव्हा त्यांनी आपल्या बापाकडून सुद्धाअलिप्त असल्याचे जाहीर करून टाकले. जसे की, सू.बराअत्-११४ मध्ये आहे (सू.बराअत्, सू.तौबाला म्हणण्यात येते.)

१७) 'तवक्कल' चा अर्थ आहे, शक्यतेच्या मर्यादेपर्यंत, उघड साधन सामुग्री अंगिकारल्यानंतर, मामला अल्लाहच्या हवाली करून देण्यात यावा. हा अर्थ नाही की, उघड साधनसामुग्री अंगिकारल्याशिवायच, अल्लाहवर भरवसा आणि तवक्कल जाहीर केला जावा; म्हणून यापासून आम्हास मना करण्यात आले आहे. म्हणून तवक्कल चा हा भावार्थ पण चूक होईल. नबी ﷺ च्या सेवेत एक मनुष्य हजर झाला, आणि उंटाला बाहेर उभा करून, आंत आला. आपण (ﷺ नी) विचारले तर म्हणाला, मी उंटाला अल्लाहच्या हवाली करून आलो आहे. आपण फर्माविले, ''हा तवक्कल नाही, 'पहिले त्याला कोण्या वस्तू ने बांध. मग अल्लाहवर भरवसा कर.'' (तिर्मिझी) 'इनाबत' चा अर्थ आहे अल्लाहकडे वळणे.

رَبَّنَا لَا تَجْعَلْنَا فِتْنَةً لِّلَّذِينَ كَفَرُوا وَاغْفِرْ لَنَا رَبَّنَا ۖ إِنَّكَ أَنتَ الْعَزِيزُ الْحَكِيمُ ⑤

**हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हास काफिरांच्या हाताखालचे आणि (त्यांच्या जुलुमा ची) कसोटी बनवूं नकोस. (१) आणि हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या अपराधांना क्षमा कर. नि:संशय तूंच सामर्थ्यवान युक्तीवान आहेस ५**

لَقَدْ كَانَ لَكُمْ فِيهِمْ أُسْوَةٌ حَسَنَةٌ لِّمَن كَانَ يَرْجُو اللَّهَ وَالْيَوْمَ الْآخِرَ ۚ وَمَن يَتَوَلَّ فَإِنَّ اللَّهَ هُوَ الْغَنِيُّ الْحَمِيدُ ⑥

**खचित्‌च तुमच्याकरीता याच्यांत (२) एक चांगला नमुना (आणि उत्कृष्ट अनुकरण) आहे, प्रत्येक त्या माणसासाठी जो अल्लाह आणि कयामतच्या दिवसाच्या भेटीवर विश्वास ठेवीत असेल. (३) आणि जर कोणी तोंड फिरवील, (४) तर अल्लाहतआला बिल्कुल बेपर्वा आणि स्तुतीस पात्र आहे. ६**

عَسَى اللَّهُ أَن يَجْعَلَ بَيْنَكُمْ وَبَيْنَ الَّذِينَ عَادَيْتُم مِّنْهُم مَّوَدَّةً ۚ وَاللَّهُ قَدِيرٌ ۚ وَاللَّهُ غَفُورٌ رَّحِيمٌ ⑦

**काही नवल नाही की, लवकरच अल्लाहतआला, तुमच्यांत आणि तुमच्या शत्रूंत, प्रेम निर्माण करून देईन. (५) अल्लाहला सर्व प्रकारचे सामर्थ्य आहे आणि अल्लाह (मोठाच) क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ७**

لَّا يَنْهَاكُمُ اللَّهُ عَنِ الَّذِينَ لَمْ يُقَاتِلُوكُمْ فِي الدِّينِ وَلَمْ يُخْرِجُوكُم مِّن دِيَارِكُمْ أَن تَبَرُّوهُمْ وَتُقْسِطُوا إِلَيْهِمْ ۚ إِنَّ اللَّهَ يُحِبُّ الْمُقْسِطِينَ ⑧

**जे लोक तुमच्याशी धर्मा संबंधाने लढले नाहीत, (६) आणि तुम्हास तुमच्या भूमीतून बाहेर काढले नाही, (७) त्यांच्याशी योग्य वागणुक आणि परोपकार करण्यास, आणि न्यायाने वागण्यांस अल्लाहतआला तुम्हांस मना करीत नाही. (८) किंबहुना अल्लाहतआला तर न्याय करणाऱ्यांस दोस्त ठेवतो. (९) ८**

१) म्हणजे काफिरांना आमच्यावर वर्चस्व आणि प्राबल्य प्रदान करू नकोस. अशा प्रकारे ते समजतील की ते सत्त्यावर आहेत. आणि मग आम्ही त्यांच्यासाठी फितन्याला कारणीभूत बनून जाऊ. किंवा हा अर्थ आहे की, त्यांच्या हातांनी किंवा आपल्याकडून आम्हास कोण्या शिक्षेत ग्रस्त करू नकोस. अशा प्रकारे सुद्धांआमचे अस्तित्व त्यांच्याकरीता फित्ना बनून जाईल ते म्हणतील, की जर हे सत्यावर असते, तर त्यांना हा त्रास का पोहचला असता?

२) म्हणजे ह.इब्राहीम ﷺ आणि त्यांचे साक्षीदार ईमानवाल्यांत आहे.

३) कारण की असेच लोक, अल्लाहला आणि परलोकांतील शिक्षेला भितात. हेच लोक परिस्थिती आणि घटनांनी धडा घेतात आणि उपदेश ग्रहण करतात.

४) म्हणजे ह.इब्राहीम ﷺ च्या नमुन्याला अंगिकारण्यापासून पळ काढला.

५) म्हणजे त्यांना मुसलमान करून तुमचे भाऊं आणि साथीदार बनवून दिले. ज्यामुळे तुमच्या आपसातील शत्रुत्व दोस्तीत आणि प्रेमांत बदलून जाईल. आणि झालेही असेच ! मक्केच्या विजयानंतर लोक झुंडीच्या झुंडी मुसलमान होणे सुरू होऊन गेले आणि त्यांच्या मुसलमान होताच, तिरस्कार करणे, प्रेमांत बदलून गेले. जे मुसलमानांच्या रक्ताचे तहानलेले होते ते मित्र आणि त्यांचे बाहुबळ बनून गेले.

६) या त्या काफिरांच्या बाबतीत सूचना देण्यांत येत आहेत, जे मुसलमानांशी निव्वळ इस्लाम धर्मामुळे द्वेष आणि शत्रुत्व बाळगत नाहीत; आणि या आधारावर मुसलमानांशी लढत नाही. ही पहिली अट आहे.

७) म्हणजे तुमच्या बरोबर अशी वागणुक पण केली नाही. की तुम्हास हिजरत करण्यास भाग पडावे. ही दुसरी अट आहे. एक तिसरी अट अशी आहे, जी पुढील महावाक्यावरून स्पष्ट होते की, त्यांनी मुसलमानांच्या विरुद्ध दुसऱ्या काफिरांना मदत सुद्धा करू नये. सल्लामसलतीने आणि हत्यारे वगैरेंनी.

८) म्हणजे अशा काफिरांनी उपकार आणि न्यायाचा मामला करण्यांस मनाई नाही. जसे अस्मा बिन्ते अबी बकर सिद्दीक (रजी.) नी रसूलुल्लाह ﷺ शी आपल्या मुशरिक आईच्या बाबतीत, चांगल्या वागणुकीबद्दल विचारले. आणि आपण (सल्ल.) फर्माविले, ''आपल्या आईबरोबर नातेसबंध ठेवा.'' (स.मुस्लिम, स. बुखारी)

९) याच्यांत न्याय करणे सांगितले गेले आहे, येथपावेतो की, काफिरांशी सुद्धां, हदीसमध्ये न्याय करणाऱ्यांचे महत्त्व असे सांगितले गेले आहे. ''न्याय करणारे 'नूर' च्या आसनांवर असतील, जे रहमानच्या उजव्या बाजूला असतील, आणि रहमानचे दोन्ही हात उजवे आहेत. जे आपल्या फैसल्यामध्ये, आपल्यावाल्यांमध्ये आणि आपल्या प्रजेत न्यायाची काळजी घेतात.'' (स.मुस्लिम)

إِنَّمَا يَنْهَىٰكُمُ ٱللَّهُ عَنِ ٱلَّذِينَ قَٰتَلُوكُمْ فِى ٱلدِّينِ وَأَخْرَجُوكُم مِّن دِيَٰرِكُمْ وَظَٰهَرُوا۟ عَلَىٰٓ إِخْرَاجِكُمْ أَن تَوَلَّوْهُمْ ۚ وَمَن يَتَوَلَّهُمْ فَأُو۟لَٰٓئِكَ هُمُ ٱلظَّٰلِمُونَ ﴿٩﴾

अल्लाहतआला तुम्हास फक्त त्या लोकांच्या प्रेमापासून मना करतो; जे तुम्हाशी धर्मासंबंधी लढले; आणि तुम्हास घराच्या बाहेर काढून लावले. आणि बाहेर काढून लावणाऱ्यांची मदत केली. जे लोक अशा काफिरांशी प्रेम करतील(१) ते खचित्‌च जालीम आहेत.(२) ⑨

يَٰٓأَيُّهَا ٱلَّذِينَ ءَامَنُوٓا۟ إِذَا جَآءَكُمُ ٱلْمُؤْمِنَٰتُ مُهَٰجِرَٰتٍ فَٱمْتَحِنُوهُنَّ ۖ ٱللَّهُ أَعْلَمُ بِإِيمَٰنِهِنَّ ۖ فَإِنْ عَلِمْتُمُوهُنَّ مُؤْمِنَٰتٍ فَلَا تَرْجِعُوهُنَّ إِلَى ٱلْكُفَّارِ ۖ لَا هُنَّ حِلٌّ لَّهُمْ وَلَا هُمْ يَحِلُّونَ لَهُنَّ ۖ وَءَاتُوهُم مَّآ أَنفَقُوا۟ ۚ وَلَا جُنَاحَ عَلَيْكُمْ أَن تَنكِحُوهُنَّ إِذَآ ءَاتَيْتُمُوهُنَّ أُجُورَهُنَّ ۚ وَلَا تُمْسِكُوا۟ بِعِصَمِ ٱلْكَوَافِرِ وَسْـَٔلُوا۟ مَآ أَنفَقْتُمْ وَلْيَسْـَٔلُوا۟ مَآ أَنفَقُوا۟ ۚ ذَٰلِكُمْ حُكْمُ ٱللَّهِ ۖ يَحْكُمُ بَيْنَكُمْ ۚ وَٱللَّهُ عَلِيمٌ حَكِيمٌ ﴿١٠﴾

हे ईमानवाल्यांनो! जेव्हा तुमच्याजवळ मुसलमान स्त्रिया हिजरत करून येतील, तेव्हा तुम्ही त्यांची परीक्षा करून घेत जा.(३) वास्तविक त्यांच्या ईमानाला चांगल्या प्रकारे जाणणारा तर अल्लाहच आहे. परंतु जर त्या तुम्हांस ईमानदार वाटतील,(४) तर मग आता तुम्ही त्यांना काफिरांकडे परत करू नका. या त्यांच्यासाठी हलाल नाहीत. आणि न ते यांच्यासाठी हलाल आहेत.(५) आणि जो खर्च त्या काफिरांचा झाला असेल, तो त्यांना अदा करून द्या.(६) त्या स्त्रियांना त्यांचे मेहेर (स्त्रीधने) देऊन, त्यांच्याशी लग्न करून घेण्यांत तुमच्यावर काही पाप नाही(७) आणि काफिर स्त्रियांची इस्मत आपल्या कबज्यांत ठेवू नका(८) आणि जो काही तुम्ही खर्च केला असेल,(९) (तो) मागून घ्या. आणि जो काही खर्च त्या काफिरांनी केला असेल,(१०) त्यांनी सुद्धा मागून घ्यावा. हा अल्लाहचा फैसला आहे. जो तुमच्या दर्म्यान तो करीत आहे.(११) अल्लाहतआला मोठाच ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. ⑩

وَإِن فَاتَكُمْ شَىْءٌ مِّنْ أَزْوَٰجِكُمْ إِلَى ٱلْكُفَّارِ فَعَاقَبْتُمْ فَـَٔاتُوا۟ ٱلَّذِينَ ذَهَبَتْ أَزْوَٰجُهُم مِّثْلَ مَآ أَنفَقُوا۟ ۚ وَٱتَّقُوا۟ ٱللَّهَ ٱلَّذِىٓ أَنتُم بِهِۦ مُؤْمِنُونَ ﴿١١﴾

आणि जर तुमची कोणी पत्नी तुमच्या हातांतून निघून जाईल, आणि काफिरांजवळ चालली जाईल; मग तुम्हांस त्यांचा मोबदला देण्याची पाळी येईल,(१२) तर ज्याच्या पत्न्या चालल्या गेल्या आहेत, त्यांना त्यांच्या खर्चा एवढी (रक्कम) अदा करा. आणि त्या अल्लाहला भित रहा, ज्यावर तुम्ही ईमान ठेवतात. ⑪

يَٰٓأَيُّهَا ٱلنَّبِىُّ إِذَا جَآءَكَ ٱلْمُؤْمِنَٰتُ يُبَايِعْنَكَ عَلَىٰٓ أَن لَّا يُشْرِكْنَ بِٱللَّهِ شَيْـًٔا وَلَا يَسْرِقْنَ وَلَا يَزْنِينَ وَلَا يَقْتُلْنَ أَوْلَٰدَهُنَّ وَلَا يَأْتِينَ بِبُهْتَٰنٍ يَفْتَرِينَهُۥ بَيْنَ أَيْدِيهِنَّ وَأَرْجُلِهِنَّ وَلَا يَعْصِينَكَ فِى مَعْرُوفٍ ۙ فَبَايِعْهُنَّ وَٱسْتَغْفِرْ لَهُنَّ ٱللَّهَ ۖ إِنَّ ٱللَّهَ غَفُورٌ رَّحِيمٌ ﴿١٢﴾

अहो पैगंबरा! जेव्हा मुसलमान स्त्रिया आपल्याशी, या गोष्टींवर प्रतिज्ञा (बैअत) करण्यासाठी येतील, की त्या अल्लाहबरोबर कोणास शामील करणार नाहीत, चोरी करणार नाहीत, व्याभिचार करणार नाही, आपल्या संततीला मारून टाकणार नाही, आणि आपल्या हातापायापुढे कुठलेही कुभांड रचून उभे करणार नाही, आणि कोण्या सुकर्मात, तुझा आज्ञाभंग करणार नाही; तर आपण त्यांच्याशी बैअत (प्रतिज्ञा) घेऊन घेत जा.(१३) आणि त्यांच्याकरीता अल्लाहकडे क्षमायाचना मागीत रहा. नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळू आहे. ⑫

१) म्हणजे अल्लाहच्या फर्मानावर आणि आदेशांवर आक्षेप घेत.
२) कारण की त्यांनी अशा लोकांशी प्रेम केले आहे, जे प्रेमास पात्र नव्हते. आणि अशा प्रकारे त्यांनी आपल्या जीवांवर जुलूम केला की, त्यांना अल्लाहच्या शिक्षेसाठी सादर करून दिले. दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''तुम्ही यहूदी आणि खिस्त्यांना दोस्त बनवू नका. ते तर आपसांतच एक दुसऱ्यांचे मित्र आहेत. तुमच्यातून जो पण यांच्यातून कोणाशी दोस्ती करेल, तो नि:संशय त्यांच्यामधूनच आहे. जालीमांना अल्लाहतआला मुळीच सरळ मार्ग दाखवित नसतो.'' (सू. माईदः-५१)
३) हुदैबियाच्या तहामध्ये एक अट अशी होती की, मक्केहून कोणी मुसलमानांजवळ चालला जाईल, तर त्याला परत करावे लागेल. परंतु याच्यांत पुरुष स्त्री असा खुलासा नव्हता. उघड पणे, यामध्ये दोघेही शामील होते. म्हणून नंतर काही स्त्रिया मक्केहून हिजरत करून, मुसलमानांजवळ चालल्या गेल्यात, तेव्हा काफिरांनी त्यांच्यावर परतीची मागणी केली. ज्यावर अल्लाहने या महावाक्यांत मुसलमानांना मार्गदर्शन केले, आणि हा हुकूम दिला. परीक्षा घेण्याचा अर्थ आहे या गोष्टीची चौकशी करा की, हिजरत करून येणारी स्त्री, जी ईमान जाहीर करीत आहे, आपल्या काफिर पतीशी नाराज होऊन, किंवा कोण्या मुसलमानाच्या प्रेमांत किंवा कोण्या आणखी कारणाने, तर आली नाही आणि केवळ येथे आश्रय घेण्याकरीता ईमानाचा दावा करीत आहे.
४) म्हणजे तुम्ही आपल्या चौकशीने या परिणामावर पोहचला आणि तुम्हास पक्की खात्री पटून जाईल की, ही खरोखर ईमानवाली आहे.
५) हे त्यांना त्यांच्या काफिर पतींजवळ परत न करण्याचे कारण आहे की आता कोणी ईमानवाली स्त्री, कोण्या

काफिरांकरीता हलाल नाही. जसे की, ईस्लामच्या सुरवातीला हे योग्य (जाएज) होते. म्हणून नबी ﷺ ची मुलगी ह.जैनब चा निकाह अबुल आसबिन रबीअ च्या बरोबर झाले होते, जेव्हा की ते मुसलमान नव्हते. परंतु या महावाक्याने भविष्यकाळाकरीता असे करण्याला मना करून टाकले. म्हणूनच येथे सांगण्यात आले की, ते एक दुसऱ्यासाठी हलाल नाहीत. म्हणून त्यांना काफिरांकडे परत पाठवू नका. होय! पती सुद्धा जर मुसलमान होऊन जाईल, तर त्यांचे लग्न कायम राहूं शकते. मग जरी पती, पत्नीच्या नंतर हिजरत करून येईल.

६) म्हणजे त्यांच्या काफिर पतींनी त्यांना जे मेहेर (स्त्रीधन) अदा केले आहे, ते तुम्ही त्यांना अदा करा.

७) हे मुसलमानांना सांगण्यांत येत आहे की, या स्त्रिया ज्या ईमानाकरीता आपल्या काफिर पतींना सोडून, तुमच्याजवळ आल्या आहेत, तुम्ही त्यांच्याशी लग्न करू शकतात. या अटीवर की त्यांचा मेहेरचा हक्क तुम्ही अदा करावा. तथापि हे लग्न सुन्नत पद्धतीनेच होईल. म्हणजे एक तर इद्दतचे घालविण्याच्या नंतर होणे. दुसरे याच्यांत वलीची परवानगी, आणि दोन न्यायप्रिय साक्षीदारांची उपस्थिती पण आवश्यक आहे. तथापि स्त्री जर समागम केलेली नाही तर इद्दतशिवाय तत्काळ लग्न होणे जाएज आहे.

८) 'इस्म' 'इस्मत' चे अनेकवचन आहे. येथे याच्याने अभिप्रेत लग्न गाठीचे पावित्र्य आहे. अर्थ हा आहे की, जर पती मुसलमान होऊन जाईल, आणि पत्नी पूर्वीप्रमाणेच काफिर आणि मुशरिक राहील, तर अशा मुशरीक स्त्रीला आपल्या लग्नबंधनात ठेवणे योग्य नाही. तिला लगेच तलाक देऊन, आपल्यापासून वेगळे केले जावे. म्हणून या हुकुमानंतर ह.उमर ﷺ नी आपल्या दोन मुशरिक पत्नींना, आणि ह.तलहा बिन उबैदुल्लानी, आपल्या पत्नीला तलाक देऊन दिला. (इब्ने कसीर) तथापि जर पत्नी ग्रंथधारी (यहूदी किंवा ख्रिस्ती) असेल तर तिला तलाक देणे आवश्यक नाही. कारण की त्यांच्याशी लग्न करणे जाएज आहे. म्हणून जर ती पूर्वीपासूनच पत्नी म्हणून तुमच्याजवळ उपस्थित आहे, तर इस्लाम कबूल केल्यानंतर तिला वेगळे करण्याची आवश्यकता नाही.

९) म्हणजे त्या स्त्रियांवर ज्या कुफ्रवर कायम राहिल्यामुळे काफिरांजवळ चालल्या गेल्या आहेत.

१०) म्हणजे त्या स्त्रियांवर, ज्या मुसलमान होऊन हिजरत करून मदिनेला येऊन गेल्या आहेत.

११) म्हणजे हा चर्चित आदेश की, उभयतांनी एक दुसऱ्याचा मेहेरचा हक्क अदा करावा. किंबहुना मागून घ्यावा (हा) अल्लाहचा हुकूम आहे. इमाम कुरतबी म्हणतात की हा हुकूम त्या काळासाठीच खास होता, यावर मुसलमानांचे एकमत आहे. (फत्हुल कदीर) याचे कारण तो वचननामा आहे, जो त्यावेळी उभय पक्षांच्या दर्म्यान होता. अशा प्रकारच्या वचननाम्याच्या स्वरुपांत, भविष्यांत सुद्धा याच्यावर अमंलबजावणी करणे आवश्यक राहील. नाही तर दुसऱ्या स्वरुपांत नाही.

१२) ''तर तुम्ही शिक्षा द्या किंवा बदला घ्या.'' चा एक भावार्थ तर हा आहे की, मुसलमान होऊन येणाऱ्या स्त्रियांचा मेहेरचा हक्क जे तुम्हास त्यांच्या काफिर पतींना अदा करावयाचे होते, ते तुम्ही त्या मुसलमानांना देऊन टाका, ज्यांच्या पत्न्या काफिर असण्यामुळे काफिरांजवळ चालल्या गेल्या आहेत. आणि त्यांनी मुसलमानांना मेहेर अदा केला नाही. (म्हणजे हे पण शिक्षेचे एक स्वरूप आहे.) दुसरा भावार्थ हा आहे की, तुम्ही काफिरांशी जिहाद करा, जो गनीमतचा माल प्राप्त होईल, त्यांत वाटणीपूर्वी त्या मुसलमानांना, ज्यांच्या पत्न्या कुफ्रच्या देशांत चालल्या गेल्यांत, त्यांनी केलेल्या खर्चाप्रमाणे त्यांना अदा करा. जणू गनीमतच्या संपत्तीपासून मुसलमानांच्या नुकसानाची भरपाई (निर्सन) ही पण शिक्षांआहे. (अय्सरुत्तफासिर व इब्ने कसीर) जर गनीमतच्या संपत्तीने सुद्धा निर्सन झाले नाही, तर बैतुलमालने मदत केली जावी.

१३) ही 'बैअत' (प्रतिज्ञा) त्यावेळी घेत, जेव्हा स्त्रिया हिजरत करून येत असत. जसे की, स.बुखारी तफसीर, सू.मुम्तहन: मध्ये आहे. याशिवाय मक्केच्या विजयाच्या दिवशी सुद्धा आपण ﷺ नी कुरैशच्या स्त्रियांशी बैत घेतली. बैतघेते वेळी आपण फक्त जबानी वचन घेत. कोण्या स्त्रीच्या हाताला आपण स्पर्श करीत नसत. हजरत आयेशा ﷺ फर्मावितात, ''अल्लाहची शपथ! बैतमध्ये नबी ﷺ च्या हाताने कधी कोण्या स्त्रीच्या हाताला स्पर्श केला नाही. बैत करतेवेळी, आपण फक्त हे सांगत, मी या गोष्टीवर तुझ्याशी बैत घेऊन घेतली.'' (स.बुखारी तफसीर, सू.मुम्तहन:) बैतमध्ये आपण ﷺ ; हे वचन सुद्धा स्त्रियांकडून घेत असत, की त्या कोणाच्या मृत्यूवर रुदन (नोहा) करणार नाहीत. आपली वस्त्रे फाडणार नाहीत, डोक्याचे केस ओढणार नाहीत, आणि अज्ञान काळासारखे मृताच्या खुब्या सांगून सांगून रडणे आणि रडविणे करणार नाही. (स.बुखारी व स. मुस्लिम वगैरे) या बैअतमध्ये, नमाज, रोजा, हज आणि जकात वगैरेंचा उल्लेख नाही. यासाठी की ही धर्माची अंगे, आणि मूळतत्त्वे असण्याच्या अनुषंगाने खुलासा करण्याची आवश्यकता नाही. आपण ﷺ नी विशेष म्हणून, या गोष्टीची बैत घेतली; ज्या सर्व साधारणपणे स्त्रियांकडून घडून येतात. कारण की त्यांनी धर्माच्या अरकानांची अंमलबजावणी करण्याबरोबरच, या गोष्टींपासून सुद्धा वांचावे. याने ही गोष्ट ठाऊक झाली की, धर्मगुरु व प्रचारक आणि वाज करणारे लोक, यांनी लोकांना संबोधित करतांना आपला जोर धर्माच्या मूळ तत्त्वांवर वर्णन करण्यांतच घालवू नये, जी पहिल्या पासूनच स्पष्ट आहेत; किंबहुना त्या वाईट गोष्टी अणि रिती रिवाजांचे संपूर्ण बळ देऊन खंडन करावे, ज्या समाजांत सर्रास आढळून येतात, आणि नमाज आणि रोजे कायम करणारे लोक सुद्धा, या गोष्टींपासून वांचत नाहीत.

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لَا تَتَوَلَّوْا قَوْمًا غَضِبَ اللّٰهُ عَلَيْهِمْ قَدْ يَىِٕسُوْا مِنَ الْاٰخِرَةِ كَمَا يَىِٕسَ الْكُفَّارُ مِنْ اَصْحٰبِ الْقُبُوْرِ ﴿١٣﴾

अहो मुसलमानांनो! तुम्ही त्या लोकांशी मैत्री ठेवू नका, ज्यांच्यावर अल्लाहचा कोप होऊन चुकला आहे. (१) जे परलोकाकडून अशा प्रकारे निराश होऊन चुकले आहेत; जसे की मेलेल्या थडग्यावाल्यांकडून काफिर निराश आहेत. (२) १३

(٦١) سُوْرَةُ الصَّفِّ مَدَنِيَّةٌ (١٠٩) اٰيَاتُهَا ١٤ رُكُوْعَاتُهَا ٢

## (६१) सू. सफ

महावाक्ये १४ — रुकूअ २

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

سَبَّحَ لِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الْاَرْضِ ۚ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿١﴾

पृथ्वी आणि आकाशाची प्रत्येक वस्तू अल्लाहतआलाचे पावित्र्य वर्णन करीत आहे; आणि तोच सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. १

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا لِمَ تَقُوْلُوْنَ مَا لَا تَفْعَلُوْنَ ﴿٢﴾

अहो ईमानवाल्यांनो (३) तुम्ही अशा गोष्टीं का म्हणतात जी करीत नाही २

كَبُرَ مَقْتًا عِنْدَ اللّٰهِ اَنْ تَقُوْلُوْا مَا لَا تَفْعَلُوْنَ ﴿٣﴾

तुम्ही जे करीत नाही, त्याचे बोलणे, अल्लाहतआलाला फारच नापसंत आहे. (४) ३

اِنَّ اللّٰهَ يُحِبُّ الَّذِيْنَ يُقَاتِلُوْنَ فِىْ سَبِيْلِهٖ صَفًّا كَاَنَّهُمْ بُنْيَانٌ مَّرْصُوْصٌ ﴿٤﴾

नि:संशय अल्लाहतआला त्या लोकांना दोस्त राखतो, जे त्याच्या मार्गात, फळी बांधून लढतात, जणू ते शिसा पाजलेली एक भींत आहे. (५) ४

وَاِذْ قَالَ مُوْسٰى لِقَوْمِهٖ يٰقَوْمِ لِمَ تُؤْذُوْنَنِىْ وَقَدْ تَّعْلَمُوْنَ اَنِّىْ رَسُوْلُ اللّٰهِ اِلَيْكُمْ ۗ فَلَمَّا زَاغُوْۤا اَزَاغَ اللّٰهُ قُلُوْبَهُمْ ۗ وَاللّٰهُ لَا يَهْدِى الْقَوْمَ الْفٰسِقِيْنَ ﴿٥﴾

आणि तो (वेळ) आठवा, जेव्हाकी, मूसाने आपल्या लोकांना म्हटले की हे माझ्या लोकांनो! तुम्ही मला का म्हणून त्रास देतात? वास्तविक तुम्हास (चांगल्या प्रकारे) ठाऊक आहे की, मी तुमच्याकडे अल्लाहचा पैगंबर (आलो) आहे; (६) मग जेव्हा हे लोक वांकडेच राहिले, तेव्हा अल्लाहने त्यांची अंत:करणे सुद्धा आणखी वाकडी करून टाकली. (७) आणि अल्लाहतआला आज्ञाभंजक लोकांस सन्मार्गाची बुद्धी देत नसतो. ५

وَاِذْ قَالَ عِيْسَى ابْنُ مَرْيَمَ يٰبَنِىْۤ اِسْرَآءِيْلَ اِنِّىْ رَسُوْلُ اللّٰهِ اِلَيْكُمْ مُّصَدِّقًا لِّمَا بَيْنَ يَدَىَّ مِنَ التَّوْرٰىةِ وَمُبَشِّرًۢا بِرَسُوْلٍ يَّاْتِىْ مِنْۢ بَعْدِى اسْمُهٗۤ اَحْمَدُ ۗ فَلَمَّا جَآءَهُمْ بِالْبَيِّنٰتِ قَالُوْا هٰذَا سِحْرٌ مُّبِيْنٌ ﴿٦﴾

आणि जेंव्हा मर्यमचे पुत्र ईसाने म्हटले, हे (माझ्या समूहा) बनी इसराईल मी तुम्हा सर्वांकडे अल्लाहचा पैगंबर आहे. मी माझ्यापूर्वीचे पुस्तक तौरातला खरे ठरवणारा (८) आहे आणि माझ्यानंतर येणाऱ्या एका पैगंबराची तुम्हांस खुषखबर ऐकविणारा आहे, ज्याचे नांव अहमद (९) आहे. मग जेव्हा ते त्याच्याजवळ खुले चमत्कार घेऊन आले, तर ते म्हणू लागले की ही तर निव्वळ जादू आहे. (१०) ६

وَمَنْ اَظْلَمُ مِمَّنِ افْتَرٰى عَلَى اللّٰهِ الْكَذِبَ وَهُوَ يُدْعٰۤى اِلَى الْاِسْلَامِ ۗ وَاللّٰهُ لَا يَهْدِى الْقَوْمَ الظّٰلِمِيْنَ ﴿٧﴾

त्या मनुष्यापेक्षा आणखी जालीम कोण असेल, जो अल्लाहवर खोटे कुभांड रचेल; (११) वास्तविक तो इस्लामकडे बोलाविला जात आहे. (१२) आणि अल्लाह अशा जालिमांना हिदायत देत नसतो. ७

१) याच्याने काहींनी यहूदी दांभिक आणि काहींनी तमाम काफिर अभिप्रेत धरले आहेत. हे शेवटचे म्हणणेच जास्त बरोबर आहे. कारण की, याच्यांत यहूदी आणि दांभिकपण येऊन जातात. याशिवाय सर्वच काफिर अल्लाहच्या प्रकोपाला पात्र आहेत. म्हणून अर्थ हा होईल की, कोण्यापण काफिरांशी मैत्रीपूर्ण संबंध ठेवू नका. जसा की हा विषय कुरआनांत कित्येक ठिकाणी सांगण्यांत आला आहे.

२) परलोकाकडून निराश होण्याचा अर्थ, कायम घडून येण्याचा इन्कार करणे आहे. कबरेत दफन झालेल्या लोकांकडून निराश होण्याचा अर्थ, पण हाच आहे की, ते परलोकांत दुसऱ्यांदा उठविले जाणार नाहीत. एक दुसरा अर्थ हा पण केला गेला आहे की, कबरींमध्ये दफन झालेले काफिर, सर्व प्रकारच्या भलाईपासून निराश होऊन गेलेत. कारण की, मरून त्यांनी आपल्या कुफ्रचा परिणाम पाहून घेतला. आता ते भलाईची काय आशा बाळगू शकतात? (इब्ने जरीर तबरी)

याच्या अवतरण्याच्या कारणात येते की, काही सहाबा आपसात बसून बोलत होते की, अल्लाहला सर्वांत जास्त आवडते कोणते कर्म आहे, त्यांनी रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला विचारावयास पाहिजे की त्यावर अंमलबजावणी केली जाऊ शकावी. परंतु आपल्याजवळ जाऊन विचारण्याची कोणी हिंमत करीत नव्हतां. यावर अल्लाहतआलाने हा अध्याय अवतरीत केला. (मुसनद अहमद ४५२/५, तिर्मिझी, तफसीर सू.सफ)

३) येथे जरी संबोधन सर्वांसाठी आहे, परंतु मूळ संबोधन त्या ईमानवाल्यांशी आहे, जे म्हणत होते की, जर आम्हाला सर्वांत जास्त आवडते कर्म कोणते आहे हे ठाऊक होऊन जाईल, तर ते आम्ही करू. परंतु जेव्हा त्यांना काही आवडते कर्म दाखविले गेले, तर ते (त्यांच्या करण्यावर) आळशी होऊन गेले. याच्यांत अशा लोकांची कानउघाडणी केली जात आहे की, भलाईच्या ज्या गोष्टी ते बोलतात, त्या का करत नाही? जी गोष्ट तोंडातून काढता, तिला पूर्ण का करीत नाही? जे जिभेने बोलतात, त्यासारखे वागत का नाही?

४) ही याची आणखी ताकीद करण्यात येत आहे की, अल्लाहतआला अशा लोकांवर फारच नाराज होतो.

५) हे जिहादचे एक फारच भले कर्म सांगण्यांत आले जे अल्लाहला फारच प्रिय आहे.

६) हे ठाऊक असून सुद्धांकी, ह.मूसा عليه السلام अल्लाहचे खरे पैगंबर आहेत, बनी इस्राईल त्यांना आपल्या तोंडाने त्रास देत असत, येथपावेतो की, काही शारीरिक दोष त्यांना लावत होते. वास्तविक त्यांच्यात तो आजार नव्हता.

७) म्हणजे ज्ञान असून सुद्धा सत्याकडून तोंड फिरविले; आणि सत्त्याच्या मुकाबल्यात असत्त्याला, भलाईच्या मुकाबल्यात वाईटाला आणि ईमानाच्या मुकाबल्यांत कुफ्रचा अंगिकार केला. तेव्हा अल्लाहतआलाने त्यावर शिक्षा म्हणून, त्यांच्या अंत:करणांना संपूर्णपणे हिदायतकडून फिरवून टाकले. कारण की हीच अल्लाहची पद्धत चालत आली आहे. कुफ्र आणि बहकण्यावर कायम रहाणे व त्यावर आग्रह धरणे, हेच अंत:करणांवर मोहोर करून देण्याला कारणीभूत होत असते मग आज्ञाभंग, कुफ्र आणि जुलूम त्याचा स्वभाव आणि सवय होऊन जाते. ज्याला बदलण्यास कोणी समर्थ नाही. म्हणून पुढे सांगितले, अल्लाहतआला आज्ञाभंजकांना हिदायत देत नसतो. यासाठी की अल्लाहतआलाने अशा लोकांना आपल्या पद्धतीप्रमाणे मार्गभ्रष्ट केलेले असते. आता कोण त्याला हिदायत देऊ शकतो. ज्याला या पद्धतीने अल्लाहने मार्गभ्रष्ट केले असेल?

८) ह.ईसाची गोष्ट यासाठी सांगितली की, बनी इस्राईलने ज्याप्रमाणे ह.मूसा عليه السلام चा आज्ञाभंग केला, त्याचप्रमाणे त्यांनी ह.ईसा عليه السلام चा पण इन्कार केला. यात नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची सांत्वना केली जात आहे की, हे यहूदी आपल्याबरोबरच असे करतात, असे नाही, किंबहुना यांचा तर पूर्ण इतिहासच पैगंबरांना नाकारण्याने भरून पडला आहे. तौरातला मान्य करण्याचा अर्थ हा आहे की, मी जे आमंत्रण देत आहे, तेच आहे जे तौरातचे पण आमंत्रण आहे. जे या गोष्टीचे प्रमाण आहे की, जे पैगंबर माझ्यापूर्वी तौरात घेऊन आले आणि आता मी इंजील घेऊन आलो, दोन्ही पुस्तकांचे मूळ एकच आहे. म्हणून ज्याप्रमाणे तुम्ही मूसा व हारून आणि दाऊद व सुलैमानावर ईमान आणले, माझ्यावर पण ईमान आणा. यासाठी की मी तौरातला मान्य करीत आहे, न की त्याचे खंडन आणि त्याला नाकारणे.

९) ही ह.ईसा عليه السلام नी आपल्यानंतर येणारे शेवटचे पैगंबर हजरत मुहम्मद रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची खूष खबर ऐकविली. म्हणून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''मी आपला बाप इब्राहीमची प्रार्थना आणि ईसाच्या खूषखबरीला सिद्ध करणारा आहे.'' (अयसरुल तफासिर) अहमद या फाईलपासून जर अतिशोक्तिचा सेगा असेल, तर अर्थ होईल की, ''दुसऱ्या तमाम लोकांपेक्षा अल्लाहची जास्त स्तुती करणारा'' आणि जर हे 'मफऊल' पासून असेल, तर अर्थ होईल की, आपल्या खुब्या आणि कमालीमुळे जेवढी प्रशंसा आपली केली गेली आहे, तेवढी कोणाची पण केली गेली नाही. (फत्हुल कदीर)

१०) म्हणजे ह.ईसा عليه السلام नी सादर केलेल्या चमत्कारांना जादू म्हटले, ज्याप्रमाणे मागील लोकांनी सुद्धांआपल्या पैगंबरांना असेच म्हटले आहे. काहींनी याच्याने अभिप्रेत नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला घेतले आहे आणि 'कालु' चा फाईल मक्केच्या काफिरांना बनविले आहे.

११) म्हणजे अल्लाहची संतती ठरविणे, किंवा जी जनावरे त्याने हराम ठरविली नाहीत, त्यांना ती हराम आहेत असे सांगणे.

१२) जो सर्व धर्मांत प्रतिष्ठीत आणि उच्च आहे, म्हणून जो मनुष्य असा असेल, त्याला केव्हा हे शोभेल की, त्याने कोणावर पण कुंभाड रचावे की, हे कसे शक्य आहे त्याने अल्लाहवरच कुभांड रचावे?

| | |
|---|---|
| ते इच्छितात की, अल्लाहच्या प्रकाशाला आपल्या तोंडाने विझवून टाकावे. [१] आणि अल्लाह आपल्या प्रकाशाला कमालीपर्यंत पोहचविणारा आहे, [२] मग काफिरांना किती का वाईट वाटेना! ⑧ | يُرِيدُونَ لِيُطْفِـُٔوا نُورَ اللَّهِ بِأَفْوَاهِهِمْ وَاللَّهُ مُتِمُّ نُورِهِۦ وَلَوْ كَرِهَ الْكَافِرُونَ ⑧ |
| तोच आहे ज्याने आपल्या पैगंबराला सन्मार्ग आणि खरा धर्म देऊन पाठविले; यासाठी की त्याला सर्व धर्मावर प्रबळ करून द्यावे, [३] मग जरी मुशरिक लोक नाखूष होवोत [४] ⑨ | هُوَ الَّذِي أَرْسَلَ رَسُولَهُۥ بِالْهُدَىٰ وَدِينِ الْحَقِّ لِيُظْهِرَهُۥ عَلَى الدِّينِ كُلِّهِۦ وَلَوْ كَرِهَ الْمُشْرِكُونَ ⑨ |
| हे ईमानवाल्यांनो! काय मी तुम्हास तो व्यापार दाखवू, [५] जो तुम्हास दु:खदायक शिक्षेपासून वांचवून घेईन ? ⑩ | يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا هَلْ أَدُلُّكُمْ عَلَىٰ تِجَارَةٍ تُنجِيكُم مِّنْ عَذَابٍ أَلِيمٍ ⑩ |
| अल्लाहतआलावर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणा, आणि अल्लाहच्या मार्गांत आपल्या धन, मन, तनाने जिहाद करा, हे तुमच्यासाठी उत्तम आहे, जर तुम्ही जाणत असाल. ⑪ | تُؤْمِنُونَ بِاللَّهِ وَرَسُولِهِۦ وَتُجَاهِدُونَ فِي سَبِيلِ اللَّهِ بِأَمْوَالِكُمْ وَأَنفُسِكُمْ ذَٰلِكُمْ خَيْرٌ لَّكُمْ إِن كُنتُمْ تَعْلَمُونَ ⑪ |
| अल्लाहतआला तुमचे अपराध क्षमा करून टाकीन, आणि तुम्हांस अशा स्वर्गांत पोहचवून देईल, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात असतील; आणि स्वच्छ आणि सुंदर घरांमध्ये, जी सतत राहणाऱ्या बागांत असतील; हेच मोठे साफल्य आहे. ⑫ | يَغْفِرْ لَكُمْ ذُنُوبَكُمْ وَيُدْخِلْكُمْ جَنَّاتٍ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ وَمَسَاكِنَ طَيِّبَةً فِي جَنَّاتِ عَدْنٍ ذَٰلِكَ الْفَوْزُ الْعَظِيمُ ⑫ |
| आणि तुम्हास एक दुसरी (देणगी) पण देईल. जिला तुम्ही इच्छितात ती अल्लाहची मदत आणि लवकर मिळणारा विजय आहे. [६] ईमानवाल्यांना खुषखबरी ऐकवून द्या. [७] ⑬ | وَأُخْرَىٰ تُحِبُّونَهَا نَصْرٌ مِّنَ اللَّهِ وَفَتْحٌ قَرِيبٌ وَبَشِّرِ الْمُؤْمِنِينَ ⑬ |

१) प्रकाशाने अभिप्रेत कुरआन किंवा इस्लाम किंवा मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम किंवा तर्क आणि प्रमाणे आहेत. ''तोंडाने विझवून टाकावे.'' म्हणजे ते टोमणे आणि निंदेची बोलणी आहेत, जी त्यांच्या तोंडातून निघत होती.

२) म्हणजे याला आसमंतात पसरविणारा आणि दुसऱ्या तमाम धर्मावर प्रबळ करणारा आहे प्रमाणांच्या अनुषंगाने किंवा भौतिक वर्चस्वाच्या अनुषंगाने किंवा दोन्ही अनुषंगाने.

३) ही मागील गोष्टीचीच ताकीद आहे, याच्या महत्त्वाला दृष्टीसमोर ठेवून, पुन्हा सांगण्यांत आले आहे.

४) तथापि हे अवश्यच होऊन राहील.

५) हे कर्म (म्हणजे ईमान आणि जिहाद) ला व्यापाराने संबोधित केले, यासाठी की, याच्यात पण त्यांना व्यापारासारखा नफा होईल आणि तो नफा काय आहे? स्वर्गांत प्रवेश आणि नर्काग्नीपासून सुटका. अयापेक्षा जास्त कोणता नफा होईल? या गोष्टीला दुसऱ्या ठिकाणी अशा प्रकारे सांगितले, ''अल्लाहने ईमानवाल्यांशी त्याचे प्राण आणि संपत्तीचा सौदा स्वर्गाच्या बदल्यांत करून घेतला आहे.'' (सू. तौबा-१११)

६) म्हणजे जेव्हा तुम्ही त्याच्यामार्गात लढाल आणि त्याच्या धर्माची मदत कराल, तर तो सुद्धा विजय आणि मदत बहाल करेन ''अल्लाहच्या धर्माची मदत कराल तर तो तुमची मदत करेल आणि तुमचे पाय दृढ जमवून ठेवेल.'' (सू. मुहम्मद-७) '' जो अल्लाहची मदत करेल, अल्लाहपण जरूर त्याची मदत करेल. नि:संशय अल्लाह मोठा शक्तीमान आणि सामर्थ्यवान आहे.'' (सू. हज-४०) परलोकाच्या देणग्यांच्या मुकाबल्यांत त्याला 'जवळचा विजय' ठरवला. आणि याच्याने अभिप्रेत मक्केचा विजय आहे आणि काहींनी इराण आणि रोमच्या महान व बलाढ्य राष्ट्रांवर मुसलमानांच्या वर्चस्वाला याला पात्र ठरविले आहे. जे खिलाफत काळांत मुसलमानांना प्राप्त झाले.

७) स्वर्गाची सुद्धां, मेल्यानंतर आणि विजयाच्या मदतीची सुद्धां, या जगांमध्ये. या अटीवर की, ईमानवाले ईमानच्या तगाद्यांना पूर्ण करत राहतील. ''आणि तुम्हीच वरचढ राहाल, जर तुम्ही ईमानवाले आहांत.'' (सू. आले इमरान-१३९) पुढे अल्लाहतआला ईमानवाल्यांना आपल्या धर्माची मदत करण्याचे आणखी प्रोत्साहन देत आहे.

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا كُوْنُوْٓا اَنْصَارَ اللّٰهِ كَمَا قَالَ
عِيْسَى ابْنُ مَرْيَمَ لِلْحَوَارِيّٖنَ مَنْ اَنْصَارِيْٓ اِلَى اللّٰهِ ؕ
قَالَ الْحَوَارِيُّوْنَ نَحْنُ اَنْصَارُ اللّٰهِ فَاٰمَنَتْ طَّآئِفَةٌ
مِّنْۢ بَنِيْٓ اِسْرَآءِيْلَ وَكَفَرَتْ طَّآئِفَةٌ ۚ فَاَيَّدْنَا
الَّذِيْنَ اٰمَنُوْا عَلٰى عَدُوِّهِمْ فَاَصْبَحُوْا ظٰهِرِيْنَ ﴿١٤﴾ ع ٢ ١٥

हे ईमानवाल्यांनो! तुम्ही अल्लाहतआलाचे मददगार बनून [१] जा! ज्याप्रमाणे हजरत मर्यमचे पूत्र ह.ईसा (अ.) ने हवारींना सांगितले की कोण आहे जो अल्लाहच्या मार्गात माझा मददगार बनेल? हवारी म्हणाले, आम्ही अल्लाहच्या मार्गांत मददगार आहोत, [२] मग बनी इस्राईलमधून एक समूह, तर ईमान घेऊन आला, आणि एका समूहाने कुफ्र केले. [३] तेव्हा आम्ही ईमानवाल्यांची त्यांच्या शत्रुच्या मुकाबल्यांत मदद केली. तर तेच (शेवटी) प्रबळ राहिले. [४] १४

اٰيَاتُهَا ١١ (٦٢) سُوْرَةُ الْجُمُعَةِ مَدَنِيَّةٌ (١١٠) رُكُوْعَاتُهَا ٢

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

## (६२) सू. जुमुअ:

महावाक्ये ११ | रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يُسَبِّحُ لِلّٰهِ مَا فِي السَّمٰوٰتِ وَمَا فِي الْاَرْضِ الْمَلِكِ
الْقُدُّوْسِ الْعَزِيْزِ الْحَكِيْمِ ﴿١﴾

आकाश आणि पृथ्वीतील, (प्रत्येक वस्तू) अल्लाहचे पावित्र्य वर्णन करीत आहे. (जो) बादशाह परम पवित्र, सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. १

هُوَ الَّذِيْ بَعَثَ فِي الْاُمِّيّٖنَ رَسُوْلًا مِّنْهُمْ يَتْلُوْا عَلَيْهِمْ
اٰيٰتِهٖ وَيُزَكِّيْهِمْ وَيُعَلِّمُهُمُ الْكِتٰبَ وَالْحِكْمَةَ ۗ وَاِنْ
كَانُوْا مِنْ قَبْلُ لَفِيْ ضَلٰلٍ مُّبِيْنٍ ﴿٢﴾

तोच आहे, ज्याने निरक्षर लोकांमधून [५] त्यांच्यातून एक पैगंबर पाठविला; जो त्यांना त्याची महावाक्ये वाचून ऐकवितो, आणि त्यांना पवित्र करतो. आणि त्यांना पुस्तक आणि शहाणपणाच्या (गोष्टी) शिकवितो. खचित्‌च हे याच्यापूर्वी धडधडीत चुकीत पडले होते. २

وَّاٰخَرِيْنَ مِنْهُمْ لَمَّا يَلْحَقُوْا بِهِمْ ؕ وَهُوَ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿٣﴾

आणि दुसऱ्यांकरीता सुद्धा त्यांच्यातूनच जे अद्यापि त्यांना भेटले नाहीत. [६] आणि तोच सामर्थ्यवान आणि बुद्धीमान आहे. ३

ذٰلِكَ فَضْلُ اللّٰهِ يُؤْتِيْهِ مَنْ يَّشَآءُ ؕ وَاللّٰهُ ذُو الْفَضْلِ
الْعَظِيْمِ ﴿٤﴾

हे अल्लाहचे औदार्य आहे, [७] ज्याला इच्छिल त्याला ती देईल, आणि अल्लाह महाकृपानिधान आहे. ४

مَثَلُ الَّذِيْنَ حُمِّلُوا التَّوْرٰىةَ ثُمَّ لَمْ يَحْمِلُوْهَا
كَمَثَلِ الْحِمَارِ يَحْمِلُ اَسْفَارًا ؕ بِئْسَ مَثَلُ الْقَوْمِ
الَّذِيْنَ كَذَّبُوْا بِاٰيٰتِ اللّٰهِ ؕ وَاللّٰهُ لَا يَهْدِي الْقَوْمَ
الظّٰلِمِيْنَ ﴿٥﴾

ज्या लोकांना तौरातवर अंबलबजावणी करण्याचा हुकूम दिला गेला, मग त्यांनी त्याच्यावर अंमलबजावणी केली नाही, त्यांचे उदाहरण त्या गाढवासारखे आहे, ज्याच्यावर पुष्कळशी पुस्तके लादलेली असावीत. [८] अल्लाहच्या निशाण्यांस खोटे ठरवणाऱ्यांचा हा फार मोठा वाईट दृष्टांत आहे आणि अल्लाह (अशा) जालीम लोकांना सन्मार्गाची बुद्धी (हिदायत) देत नसतो. ५

قُلْ يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ هَادُوْٓا اِنْ زَعَمْتُمْ اَنَّكُمْ اَوْلِيَآءُ
لِلّٰهِ مِنْ دُوْنِ النَّاسِ فَتَمَنَّوُا الْمَوْتَ اِنْ كُنْتُمْ
صٰدِقِيْنَ ﴿٦﴾

सांगून द्या की, अहो यहुद्यांनो जर तुमचा दावा आहे की, तुम्ही दुसऱ्या लोकांशिवाय अल्लाहचे मित्र आहात, [९] तर तुम्ही मृत्यूची आशा बाळगा [१०] जर तुम्ही खरे आहात [११] ६

१) सर्व परिस्थितीत आपल्या म्हणण्या आणि करण्यामार्फत सुद्धा आणि प्राण आणि संपत्तीद्वारे सुद्धा जेव्हांपण आणि ज्या वेळी सुद्धांआणि ज्या परिस्थितीत सुद्धा, तुम्हास अल्लाह आणि त्याचा पैगंबर आपल्या धर्मासाठी बोलावील, तुम्ही लगेच त्यांच्या बोलाविण्यावर हजर व्हा ज्याप्रमाणे हवारीं ईसा عليه السلام च्या बोलाविण्यावर हजर झाले.

२) म्हणजे आम्ही आपल्या धर्माचा प्रचार आणि प्रसार यामध्ये तुमचे मददगार आहोत. ज्याच्या प्रचार आणि जाहिरातीचा हुकूम अल्लाहने आपणांस दिला आहे. अशाप्रकारे रसूलुल्लाह ﷺ हजच्या दिवसांत लोकांना म्हणत असत; ''कोण आहे की जो मला आश्रय देईल, की मी लोकांपर्यंत अल्लाहचा संदेश पोहचवू शकेन. यासाठी की, कुरैश मला, पैगंबरीचे कर्तव्य अदा करू देत नाही.'' येथ पावेतो की, या साद घालण्यावर मदीनेच्या 'औस' आणि 'खजरज' ने, आपली मदत करण्याला आणि आपल्याला आश्रय देण्याला तयारी दाखविली. आपल्या हातांवर त्यांनी प्रतिज्ञा (बैत) केली. आणि आपली मदत करण्याचा वायदा केला. तसेच आपल्यापुढे आश्वासन दिले की जर आपण हिजरत करून मदीनेला आलांत, तर आपल्या संरक्षणाची जबाबदारी आम्ही उचलतो. म्हणून जेव्हा आपण हिजरत करून मदीनेला गेलेत, तेव्हा वायद्यांप्रमाणे, त्यांनी आपली आणि आपल्या तमाम साथीदारांची संपूर्ण मदत केली.

येथपावेतो की अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने त्यांचे नांवच ''अन्सार'' ठेवून दिले.

३) हे यहूदी होते ज्यांनी ईसा عليه السلام च्या पैगंबरीचाच इन्कार केला नाहीतर त्यांच्यावर आणि त्यांच्या आईवर कुभांड रचले. काही म्हणतात की, हा मतभेद आणि फाटाफुट त्यावेळी झाली, जेव्हा ह.ईसा عليه السلام ला आकाशावर उचलून घेण्यांत आले. एकाने म्हटले की, ह.ईसा عليه السلام च्या रुपांत अल्लाहतआलाच जमिनीवर प्रकट झाला होता; आता तो पुन्हा आकाशावर चालला गेला. हा याकूबिया पंथ म्हणविला जातो. नसतूरीया पंथाने म्हटले ते अल्लाहचे पूत्र होते. बापाने मुलाला आकाशावर बोलावून घेतले आहे. तिसऱ्या पंथाने म्हटले ते अल्लाहचे सेवक आणि त्याचे पैगंबर होते. हा पंथ बरोबर होता.

४) म्हणजे नबी ﷺ ला, पैगंबरी प्रदान करून आम्ही या शेवटच्या जनसमूहाची दुसऱ्या निरर्थक गटांच्या मुकाबल्यात मदत केली. म्हणून हा बरोबर धारणा पाळणारा समूह नबी ﷺ वर पण ईमान घेऊन आला आणि अशाप्रकारे आम्ही प्रमाणांच्या दृष्टीने सुद्धा सर्व काफिरांवर वर्चस्व दिले आणि सामर्थ्य आणि राज्यधिकाराच्या अनुषंगाने सुद्धा. या वर्चस्वाचे शेवटचा दर्शन त्यावेळी होईल, जेव्हा कयामतच्या जवळपास ह.ईसा عليه السلام चे दुसऱ्यांदा पुन:आगमन होईल जसे की पुन:आगमन आणि वर्चस्व याचा खुलासा सही हदीशीमध्ये क्रमश: आलेला आढळतो.

✪ नबी ﷺ जुमुअः च्या नमाजीत सू. जुमुअः आणि सू. मुनाफिकून पढत असत. (स.मुस्लिम, किताबुल जुमुअः) तथापि यांचे शुक्रवार रात्री ईशाच्या नमाजीमध्ये पढणे सही हदीसने सिद्ध नाही.

५) 'उम्मीईन' ने अभिप्रेत अरब आहेत. ज्यांचे बहुतेक लोक निरक्षर होते, यांच्या खास उल्लेखाचा हा अर्थ नाही की, आपली (सल्ल.) पैगंबरी दुसऱ्यांसाठी नव्हती. परंतु प्रथमत: संबोधित ते लोक होते. म्हणून अल्लाहचा त्यांच्यावर हा जास्तीचा उपकार आहे.

६) म्हणजे अरबेतर लोक आहेत; जे कयामतपर्यंत आपल्यावर ईमान आणणारे होतील. काही म्हणतात की, अरब आणि अरबेतर ते तमाम लोक आहेत, जे सहाबांच्या काळानंतर कयामतपर्यंत होतील. म्हणून याच्यात ईराण, रोम, बार्बर, सुदान, तूर्क, मंगोल, कुर्द, चिनी आणि हिंदुस्थानवाले, वगैरे सर्व येऊन जातात. म्हणजे आपली पैगंबरी सर्वांसाठी आहे. म्हणून हे सर्व लोकच आपल्यावर ईमान घेऊन आले आणि इस्लाम आणल्यानंतर हे पण 'मिनहुम्' ला पात्र म्हणजे प्रथम इस्लाम आणणाऱ्यांमधून झाले. कारण की तमाम मुसलमान एकच उम्मत आहे.

७) हा इशारा ह.मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीकडे सुद्धा असू शकतो. आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांकडे सुद्धा.

८) 'असफार' सिफ्र चे अनेकवचन आहे. अर्थ आहे मोठे पुस्तक. पुस्तक जेव्हा वांचले जाते, तेव्हा मनुष्य त्याच्या विषयांत सफर करतो. म्हणून पुस्तकाला सुद्धा 'सफर' म्हटले जाते. (फत्हुल कदीर) हे कर्महीन यहुद्यांचे उदाहरण दिले जात आहे. ज्याप्रमाणे गाढवाला ठाऊक नसते की त्याच्या पाठीवर जी पुस्तके लादली गेली आहेत, याच्यांत काय लिहीलेले आहे? किंवा त्याच्यावर पुस्तके लादली गेली आहेत की केरकचरा? अशाचप्रकारे हे यहूदी सुद्धाआहेत. हे तौरातला तर उचलून फिरतात. याला वांचण्याचे आणि लक्षांत ठेवण्याचे वायदेपण करतात; परंतु याला समजत नाही आणि याच्या तगाद्यावर अमंल बजावणी करीत नाहीत. किंबहुना याच्यांत ढवळाढवळ, आणि हेरफेर करतात. म्हणून हे वास्तवांत गाढवापेक्षा सुद्धा जास्त वाईट आहेत. कारण की, गाढव तर स्वभाविकपणे जाणीव आणि समज नसलेले असते. जेव्हा की यांच्यामध्ये जाणीव आणि समज असते. परंतु हे तिचा योग्यप्रकारे वापर करीत नाहीत. म्हणूनच पुढे सांगितले की, याचे हे फार मोठे वाईट उदाहरण (उपमा) आहे. आणि दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''हे चतुष्पाद जनावरांसारखे आहेत, किंबहुना त्यांच्यापेक्षा सुद्धा जास्त मार्गभ्रष्ट (आहेत.)'' (सू. आअराफ-१७९) हेच उदाहरण त्या मुसलमानांचे आणि धर्मपंडितांचे आहे, जे कुरआन वाचतात, त्याला पाठ करतात, आणि त्याच्या अर्थाला समजतात, परंतु त्याच्या तगाद्यांवर अंमलबजावणी करीत नाहीत.

९) हे ते म्हणत असत की, ''आम्ही अल्लाहचे पुत्र आणि त्याचे लाडके आहोत.'' (सू. अल् माईदः-१८) आणि दावा करीत असत की, ''स्वर्गांत फक्त तोच जाईल जो यहूदी किंवा ख्रिस्ती असेल.'' (सू. बकरः-१११)

१०) कारण की तुम्हास तो मानमर्तबा आणि प्रतिष्ठा प्राप्त व्हावी, जी तुमच्या कल्पनेप्रमाणे तुमच्याकरीतां असावयांस पाहिजे.

११) यासाठी की ज्याला हे ठाऊक असेल की, मेल्यानंतर त्याच्याकरीता स्वर्ग आहे, तर तो तेथे लवकर पोहचण्याचा इच्छुक असतो. हाफीज इब्ने कसीरने याचे स्पष्टीकरण मुबाहिला (एक दुसऱ्यासाठी बद्दुआ करणे) च्या अवाहनाने केले आहे. म्हणजे याच्यांत त्यांना सांगण्यांत आले आहे की, जर तुम्ही मुहम्मद ﷺ च्या पैगंबरीला नाकारणारे आणि आपल्या मैत्री आणि (अल्लाहच्या) लाडके होण्याच्या दाव्यांत खरे आहांत, तर मुसलमानांबरोबर 'मुबाहिला' करून घ्या. म्हणजे मुसलमान आणि यहूदी उभयता मिळून अल्लाहच्या दरबारांत दुआ करावी की हे अल्लाह! आम्हा दोघांत जो लबाड आहे, त्याला मृत्यु देऊन दे! (पहा सू.बकरः आ.९४ चा समास)

وَلَا يَتَمَنَّوْنَهٗۤ اَبَدًاۢ بِمَا قَدَّمَتْ اَيْدِيْهِمْ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌۢ بِالظّٰلِمِيْنَ ۝۷

हे मुळीच मृत्यूची हाव घालणार नाही, त्या कर्मांमुळे जे आपल्या हातांनी (पुढे) पाठवून ठेवीले आहेत. [१] आणि अल्लाह जालिमांना खूप जाणतो. ७

قُلْ اِنَّ الْمَوْتَ الَّذِیْ تَفِرُّوْنَ مِنْهُ فَاِنَّهٗ مُلٰقِیْكُمْ ثُمَّ تُرَدُّوْنَ اِلٰی عٰلِمِ الْغَیْبِ وَالشَّهَادَةِ فَیُنَبِّئُكُمْ بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ۝۸ ع ١/٨/١١

१ ع ८ ११ (आपण) सांगून टाका, ज्या मृत्युपासून (तुम्ही) पळत फिरत आहात, तो तर तुम्हांस (अवश्य) येऊन भेटेल. मग तुम्ही सर्व अदृष्ट आणि दृष्टाच्या जाणणाऱ्या अल्लाकडे पालटून नेले जाल मग तो तुम्हांस तुमची सर्व केलेली कर्म विदीत करील. ८

یٰۤاَیُّهَا الَّذِیْنَ اٰمَنُوْۤا اِذَا نُوْدِیَ لِلصَّلٰوةِ مِنْ یَّوْمِ الْجُمُعَةِ فَاسْعَوْا اِلٰی ذِكْرِ اللّٰهِ وَذَرُوا الْبَیْعَ ؕ ذٰلِكُمْ خَیْرٌ لَّكُمْ اِنْ كُنْتُمْ تَعْلَمُوْنَ ۝۹

अहो त्या लोकांनो ! ज्यांनी ईमान आणले आहे, शुक्रवारच्या दिवशी नमाजीसाठी बांग पुकारली जाईल तेव्हा तुम्ही अल्लाहच्या स्मरणा (नमाजी) कडे लवकर येऊन जात चला. आणि क्रय विक्रय सोडून द्या. [२] हे तुमच्या ठायी फारच उत्तम आहे, जर तुम्हास समज असेल. ९

فَاِذَا قُضِیَتِ الصَّلٰوةُ فَانْتَشِرُوْا فِی الْاَرْضِ وَابْتَغُوْا مِنْ فَضْلِ اللّٰهِ وَاذْكُرُوا اللّٰهَ كَثِیْرًا لَّعَلَّكُمْ تُفْلِحُوْنَ ۝۱۰

मग जेव्हा नमाज होऊन चुकेल, तेव्हा पृथ्वीत पसरून जा आणि अल्लाहच्या औदार्याच्या शोधात लागून जा; [३] आणि अल्लाहचे भरपूर स्मरण करीत रहा की, (कदाचित) तुम्ही साफल्य पावाल. आणि अल्लाहचे भरपूर स्मरण करीत रहा की, (कदाचित) तुम्ही साफल्य पावाल. १०

وَاِذَا رَاَوْا تِجَارَةً اَوْ لَهْوَا اِنْفَضُّوْۤا اِلَیْهَا وَتَرَكُوْكَ قَآئِمًا ؕ قُلْ مَا عِنْدَ اللّٰهِ خَیْرٌ مِّنَ اللَّهْوِ وَمِنَ التِّجَارَةِ ؕ وَاللّٰهُ خَیْرُ الرّٰزِقِیْنَ ۝۱۱ ع ٢/٣/١٢

२ ع ३ १२ आणि (हे लोक) जेव्हा कोणी सौदा विकतांना पाहतील किंवा कोणी तमाशा दिसू लागेल तर त्याच्याकडे पळत जातात. आणि आपल्याला उभाच सोडून जातात. [४] आपण सांगून टाका की, अल्लाहजवळ जे आहे, [५] ते खेळ तमाशा आणि व्यापारापेक्षा उत्तम [६] आहे आणि अल्लाहतआला उत्तम अन्नदाता आहे. [७] ११

(٦٣) سُوْرَةُ الْمُنٰفِقُوْنَ مَدَنِيَّةٌ (١٠٤) | اٰیَاتُهَا ١١ | رُكُوْعَاتُهَا ٢

बِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِیْمِ

## (६३) सू. मुनाफिकून

महावाक्ये ११ | रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِذَا جَآءَكَ الْمُنٰفِقُوْنَ قَالُوْا نَشْهَدُ اِنَّكَ لَرَسُوْلُ اللّٰهِ ۘ وَاللّٰهُ یَعْلَمُ اِنَّكَ لَرَسُوْلُهٗ ؕ وَاللّٰهُ یَشْهَدُ اِنَّ الْمُنٰفِقِیْنَ لَكٰذِبُوْنَ ۝۱ منزل ٧

तुझ्याजवळ जेव्हा मुनाफिक येतात तेव्हा म्हणू लागतात की, आम्ही या गोष्टीला साक्ष आहोत की, नि:संशय आपण अल्लाहचे पैगंबर आहांत. [८] आणि अल्लाहला माहित आहे की, खचित्‌च आपण त्याचे पैगंबर आहांत. [९] आणि अल्लाह साक्ष देतो की, हे दांभिक लोक बिल्कुल लबाड आहेत. [१०] १

اِتَّخَذُوْۤا اَیْمَانَهُمْ جُنَّةً فَصَدُّوْا عَنْ سَبِیْلِ اللّٰهِ ؕ اِنَّهُمْ سَآءَ مَا كَانُوْا یَعْمَلُوْنَ ۝۲

त्यांनी आपल्या शपथांना ढाल बनवून ठेवले आहे. [११] तर ते अल्लाहच्या मार्गांपासून थांबले. [१२] नि:संशय वाईट आहे ते काम, जे हे करीत आहे. २

ذٰلِكَ بِاَنَّهُمْ اٰمَنُوْا ثُمَّ كَفَرُوْا فَطُبِعَ عَلٰی قُلُوْبِهِمْ فَهُمْ لَا یَفْقَهُوْنَ ۝۳

हे यामुळे आहे की, हे ईमान आणून मग पुन्हा काफिर होऊन गेलेत; [१३] तर त्यांच्या अंत:करणावर मोहोर लावून दिली गेली. आता ते समजत नाही. ३

१) म्हणजे कुफ्र आणि पाप, आणि अल्लाहच्या पुस्तकांत जो हेरफेर आणि बदला चा जो प्रयत्न हे करतात. यामुळे कधीही हे मृत्युची हांव घालणार नाहीत.

२) ही अजान कशाप्रकारे दिली जावी, तिचे शब्द काय असावेत? हे कुरआनांत कोठेही नाही. तथापि हदीसमध्ये आहे, ज्याने ठाऊक झाले की, हदीशीशिवाय कुरआनाला समजणे आणि त्यावर अंमल करणे शक्य नाही. जुमुअ: ला जुमुअ: यासाठी म्हणतात की, या दिवशी अल्लाहतआला प्रत्येक वस्तुच्या निर्मितीपासून मुक्त झाला होता.

अशाप्रकारे जणू सर्व सृष्टीचे संम्मेलन होऊन गेले. किंवा नमाजीकरीता लोकांचे एकत्र गोळा होणे होते, यामुळे म्हणतात (फत्हुल कदीर) 'फसअव' चा अर्थ हा नाही की, धावत या ! किंबहुना हा आहे की, अजान झाल्यानंतर लगेच निघा आणि कारभार बंद करा. कारण की नमाजीसाठी, पळत पळत येणे मना आहे. स्वस्थ आणि समाधानाने निघण्याची ताकीद केली गेली आहे. (स.बुखारी, स.मुस्लिम) पैगंबर काळांत, फक्त एकच अजान होत असे, जेव्हा आपण ﷺ मिंबरबर येऊन बसत. (फत्हुल कदीर) म्हणूनच या पैगंबर ﷺ च्या अजानीवर जमून रहाणे उत्तम आहे. काहींनी 'जरुल बयअ' (खरेदी विक्री सोडून द्या) ने आधार घेतला आहे की, जुमुअ: फक्त शहरांतच फर्ज आहे. गांवात रहाणाऱ्यांवर नाही. कारण की, कारभार आणि खरेदी विक्री फक्त शहरांतच होते, गांवामधून नाही. आपल्या या 'फिकाहूत' (धर्मशास्त्रीय विवेचन) वर त्यांना फार अभिमान आहे की, कुरआनाच्या शब्दांनी फिका हनाफियाचा मसला सिद्ध करून दिला. प्रथम तर जगांमध्ये कोणी गांव असे नाही जेथे खरेदी विक्री आणि कारभार होत नसेल. म्हणून हा दावा वस्तुस्थितीच्या विरुद्ध आहे. दुसरा व्यापार आणि कारभाराचा अर्थ ऐहिक व्यस्तता आहे, ती कशीपण आणि कशाही प्रकारची का असेना! जुमुआ च्या अजानीनंतर त्यांना खंडीत केले जावे. काय गाववाले ऐहिक काम धंद्यात व्यस्त नसतात? काय शेतीवाडी, कारभार आणि ऐहिक व्यस्तत्ये पासून वेगळी गोष्ट आहे?

३) याच्याने अभिप्रेत कारभार आणि व्यापार आहे. म्हणजे जुमुआचा नमाजीहून मुक्त होऊन, तुम्ही पुन्हा आपआपले कारभार आणि ऐहिक व्यस्तेत व्यस्त होऊन जा. उद्देश्य या हुकूमाचा खुलासा हा आहे की, शुक्रवारच्या दिवशी कारभार बंद ठेवण्याची आवश्यकता नाही, फक्त नमाजीच्या वेळी असे करणे आवश्यक आहे.

४) एकदा नबी करीम ﷺ जुमुआचे प्रवचन करीत होते की, एक काफला येऊन पोहचला. लोकांना ठाऊक झाले, तेव्हा प्रवचन सोडून बाहेर खरेदी विक्रीसाठी चालले गेले की कोठे विक्रीचा सामान संपून न जावा. फक्त १२ माणसे मशिदीत राहून गेले. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. (स.बुखारी तफसीर सू.जुमुअ:, स.मुस्लिम) यासाठी की जेव्हा व्यापार सुद्धा, योग्य आणि आवश्यक असून सुद्धा, प्रवचना दर्म्यान निंदनीय आहे. तर खेळ वगैरे निंदनीय होण्यांत काय शंका असू शकते? याशिवाय 'कायमन्' ने ठाऊक झाले की, जुमुआचा खुतबा उभे राहून करणे सुन्नत आहे. म्हणून हदीसमध्ये सुद्धा येते की, आपण दोन खुतबे देत असत, ज्यांच्या दर्म्यान आपण ﷺ बसत असत, कुरआन म्हणत आणि लोकांना उपदेश करीत. (स. मुस्लिम, किताबुल जुमुअ:)

५) म्हणजे अल्लाह आणि रसूलच्या आदेशांचे आज्ञापालन केले; जे मोठा मोबदला मिळण्यास पात्र आहे.

६) ज्याकडे तुम्ही धांवत धांवत गेले, आणि मशिदीतून निघून गेले; आणि जुमुआचा खुतबापण ऐकला नाही.

७) तर त्याच्याचकडून रोजी मागा. आणि आज्ञापालनामार्फत त्याच्याकडे वशीला लावा. त्याचे आज्ञापालन आणि त्याच्याकडे वळणे, रोजी मिळविण्याची फार मोठी सबब आहे.

८) मुनाफिकने अभिप्रेत अब्दुल्लाह् बिन उबई आणि त्याचे साथीदार आहेत. हे जेव्हा नबी ﷺ च्या सेवेत हजर होत, तेव्हा शपथा वाहून वाहून म्हणत की, आपण अल्लाहचे पैगंबर आहांत.

९) हे वाक्य आक्षेपार्ह आहे. जे या पूर्वीच्या विषयासाठी ताकीद म्हणून आहे. ज्याला दांभिक लोक, दंभ म्हणून जाहीर करीत. अल्लाहतआलाने फर्माविले की हे तर असेच तोंडाने म्हणतात, याची अंत:करणे या विश्वासाने रिक्त आहेत. परंतु आम्हांस ठाऊक आहे की, आपण अल्लाहचे खरोखर पैगंबर आहांत.

१०) या गोष्टीची की ते अंत:करणपूर्वक आपल्या पैगंबरीची साक्ष देत आहे. म्हणजे मनापासून साक्ष देत नाही, फक्त तोंडाने धोका देण्यासाठी असे जाहीर करतात.

११) म्हणजे ते जे शपथ वाहून म्हणतात की, आम्ही तुमच्यासारखेच मुसलमान आहोत. आणि हे की, मुहम्मद (ﷺ) अल्लाहचे पैगंबर आहेत. त्यांनी आपल्या या शपथेला ढाल बनवून ठेवले आहे. यामुळे ते तुमच्यापासून वांचून रहातात; आणि काफिरांप्रमाणे तुमच्या तलवारींच्या माऱ्यांत येत नाही.

१२) दुसरे भाषांतर आहे की, त्यांनी शंकाकुशंका निर्माण करून, लोकांना अल्लाहच्या मार्गापासून अडविले.

१३) याच्याने ठाऊक झाले की, दांभिक लोक सुद्धा निव्वळ काफिर आहेत.

وَإِذَا رَأَيْتَهُمْ تُعْجِبُكَ أَجْسَامُهُمْ ۖ وَإِن يَقُولُوا تَسْمَعْ
لِقَوْلِهِمْ ۖ كَأَنَّهُمْ خُشُبٌ مُّسَنَّدَةٌ ۖ يَحْسَبُونَ كُلَّ
صَيْحَةٍ عَلَيْهِمْ ۚ هُمُ الْعَدُوُّ فَاحْذَرْهُمْ ۚ قَاتَلَهُمُ اللَّهُ ۖ
أَنَّىٰ يُؤْفَكُونَ ﴿٤﴾

**जेव्हा आपण त्यांना पहाल तेव्हा त्यांची शरीरे आपणांस फारच चांगली वाटतील; (१) हे जेव्हा गोष्टी करू लागतील तर आपण त्यांच्या गोष्टी कान लावून ऐकाल; (२) जणू की, ते काठ्या आहेत भिंतीला टेकून ठेवलेल्या; (३) प्रत्येक कडक आवाजाला आपल्याच विरुद्ध समजतात. (४) हेच खरोखर शत्रू आहेत, तर यांच्यापासून जपत जा. अल्लाह त्यांना गारद करो! कोठल्या कोठेच बहकले जात आहेत. ४**

وَإِذَا قِيلَ لَهُمْ تَعَالَوْا يَسْتَغْفِرْ لَكُمْ رَسُولُ اللَّهِ لَوَّوْا
رُءُوسَهُمْ وَرَأَيْتَهُمْ يَصُدُّونَ وَهُم مُّسْتَكْبِرُونَ ﴿٥﴾

**आणि जेव्हा यांना सांगण्यांत येते की, या हो! तुमच्याकरीता अल्लाहचे पैगंबर क्षमेची प्रार्थना करतील, तेव्हा ते आपली डोकी फिरवून घेतात; (५) आणि आपण पहाल की ते गर्विष्ठ होऊन थांबून जातात (६) ५**

سَوَاءٌ عَلَيْهِمْ أَسْتَغْفَرْتَ لَهُمْ أَمْ لَمْ تَسْتَغْفِرْ لَهُمْ
لَن يَغْفِرَ اللَّهُ لَهُمْ ۚ إِنَّ اللَّهَ لَا يَهْدِي الْقَوْمَ
الْفَاسِقِينَ ﴿٦﴾

**या लोकांसाठी आपण क्षमेची प्रार्थना करा अथवा करू नका, दोन्ही समान आहेत. (७) अल्लाहतआला त्यांना कधीच क्षमा करणार नाही. (८) नि:संशय अल्लाहतआला अशा आज्ञाभंजक लोकांस सन्मार्गाची बुद्धी देत नसतो. ६**

هُمُ الَّذِينَ يَقُولُونَ لَا تُنفِقُوا عَلَىٰ مَنْ عِندَ رَسُولِ
اللَّهِ حَتَّىٰ يَنفَضُّوا ۗ وَلِلَّهِ خَزَائِنُ السَّمَاوَاتِ وَالْأَرْضِ
وَلَٰكِنَّ الْمُنَافِقِينَ لَا يَفْقَهُونَ ﴿٧﴾

**हे तेच आहेत, जे म्हणतात की, जे लोक रसूलुल्लाहजवळ आहेत, त्यांना काही देऊ नका, येथ पावेतो की, ते फाका फांक होऊन जातील. (९) आणि आकाश आणि पृथ्वीचे सर्व खजिने अल्लाहतआलाचेच आहेत. (१०) परंतु हे दांभिक लोक समजत नाहीत. (११) ७**

يَقُولُونَ لَئِن رَّجَعْنَا إِلَى الْمَدِينَةِ لَيُخْرِجَنَّ
الْأَعَزُّ مِنْهَا الْأَذَلَّ ۚ وَلِلَّهِ الْعِزَّةُ وَلِرَسُولِهِ وَ
لِلْمُؤْمِنِينَ وَلَٰكِنَّ الْمُنَافِقِينَ لَا يَعْلَمُونَ ﴿٨﴾

**हे म्हणतात की, जर आता परतून मदिनेला जाऊ, तर प्रतिष्ठीत लोक, हलक्या लोकांस बाहेर काढून लावतील. (१२) (ऐका!) प्रतिष्ठा तर फक्त अल्लाहतआला करीता, आणि त्याच्या पैगंबरीकरीता आणि ईमानवाल्यासाठी (१३) आहे; परंतु दांभिकास (या गोष्टीची) जाणीव नाही. (१४) ८**

يَا أَيُّهَا الَّذِينَ آمَنُوا لَا تُلْهِكُمْ أَمْوَالُكُمْ وَلَا
أَوْلَادُكُمْ عَن ذِكْرِ اللَّهِ ۚ وَمَن يَفْعَلْ ذَٰلِكَ فَأُولَٰئِكَ
هُمُ الْخَاسِرُونَ ﴿٩﴾

**अहो मुसलमानांनो! तुमची धन दौलत तुमची संतती, तुम्हास अल्लाहच्या स्मरणाकडून गाफील न करून टाको! (१५) आणि जे असे करतील ते फारच तोटे उचलणारे लोक आहेत. ९**

وَأَنفِقُوا مِن مَّا رَزَقْنَاكُم مِّن قَبْلِ أَن يَأْتِيَ أَحَدَكُمُ
الْمَوْتُ فَيَقُولَ رَبِّ لَوْلَا أَخَّرْتَنِي إِلَىٰ أَجَلٍ قَرِيبٍ
فَأَصَّدَّقَ وَأَكُن مِّنَ الصَّالِحِينَ ﴿١٠﴾

**आणि जे काही आम्ही तुम्हांस देऊन ठेवले आहे, याच्यातून (आमच्या मार्गात) खर्च करा यापूर्वीच (१६) की, तुमच्यातून कुणाला मृत्यू येऊन जावा, तेव्हा म्हणू लागतील हे माझ्या पालनकर्त्या ' तू मला थोड्या वेळेसाठी अवकाश का म्हणून देत नाहीस? (१७) की मी दानधर्म करावा आणि सदाचरणी लोकांमधून होऊन जावे. १०**

१) म्हणजे त्यांचे रुप सौंदर्य आणि सदृढतेमुळे.

२) म्हणजे त्यांच्या सुंदर आणि मधुर भाषा शैलीमुळे.

३) म्हणजे आपल्या उंच अंगकाठीमुळे आणि सौंदर्य आणि पुष्ठता, जाणीवेची उणीव आणि चांगुलपणाचा अभाव, यामध्ये असे आहेत, जणूंकी भिंतीला टेकून ठेवलेल्या काठ्या आहेत; ज्या पहाणाऱ्यांना तर फार चांगल्या वाटतात. परंतु कोणाला फायदा पोहचवूंशकत नाही. आणि अर्थ हा आहे की, हे रसूलुल्लाह च्या सभेत अशाप्रकारे बसत, जणू भिंतीला टेकून ठेवलेल्या काठ्या आहेत. ज्या कोण्या गोष्टीला समजत आणि जाणत नाहीत. (फत्हुल कदीर)

४) म्हणजे भित्रे इतके आहे की, एखादी जोरदार आरोळी ऐकतील, तर असे समजतील की, आमच्यावर कोणी संकट येऊन कोसळले आहे किंवा घाबरून जातात की, आमच्या विरुद्ध कोण्या कारवाईला तर प्रारंभ झाला नाही ? जसे चोर आणि लबाडी करणाऱ्यांचे मन आंतून धाकधुक करते.

५) म्हणजे क्षमायाचनेकडून तोंड फिरवून आपली डोकी फिरवितात.

६) म्हणजे सांगणाऱ्याच्या गोष्टीकडून तोंड फिरवून घेतील किंवा रसूलुल्लाह ﷺ कडून तोंड फिरवून घेतील.
७) आपल्या दंभावर आग्रह आणि आपल्या कुफ्रवर अडून राहिल्यामुळे ते अशा स्थानावर पोहचून गेले, क्षमेसाठी प्रार्थना करणे अथवा न करणे, त्यांच्या बाबतीत समान आहे.
८) जर याच दांभिकपणाच्या अवस्थेत ते मरून गेलेत, होय! परंतु जर ते जीवनांत कुफ्र आणि दांभिकपणापासून तौबा करून घेतील, तर वेगळी गोष्ट आहे. मग त्यांना क्षमा करून टाकणे शक्य आहे.
९) एका युद्धात (ज्याला गजवाए मरिसी किंवा राजवात बनील मुस्तलक म्हटले जाते) एक मुहाजीर आणि एका अन्सारचे भांडण होऊन गेले. उभयतांनी आपला आपला पक्ष घेण्यासाठी, अन्सार आणि मुहाजीरिनला बोलाविले. ज्यावर अब्दुल्लाह् बिन उबई (दांभिका) ने अन्सारला सांगितले की तुम्ही मुहाजिरीनची मदत केली आणि त्यांना आपल्या बरोबर ठेवले. आता बघा! त्याचा परिणाम आता पुढे येत आहे. म्हणजे हे तुमचेच खाऊन, तुमच्यावरच उलटत आहे. त्यांचा इलाज तर हा आहे की, त्यांच्यावर खर्च करणे बंद करून टाका! हे स्वत:च आपोआप पांगून जातील. तसेच त्याने हे पण सांगितले की, आम्ही (जे प्रतिष्ठीत आहोत) या अप्रतिष्ठीतां(मुहाजिरीन) ना मदीनेतून बाहेर काढून टाकू. हे जैद बिन अरकम ﷺ नी हे खोडसाळ शब्द ऐकून घेतले आणि त्यांनी येऊन रसूलुल्लाह ﷺ ला सांगितले. आपण ﷺ नी अब्दुल्लाह् बिन उबईला बोलावून विचारले, तर त्याने असे बोलल्याचे स्पष्ट नाकारून टाकले. ज्यावर ह.जैद बिन अरकमला फारच वाईट वाटले. अल्लाहतआलाने ह.जैद बिन अरकम ﷺ च्या सत्त्यतेला जाहीर करण्यासाठी सू.मुनाफिकून अवतीर्ण केला. ज्यांत इब्ने उबईच्या कर्तृत्वाला पूर्णपणे उघड करून देण्यांत आले. (स.बुखारी, तफसीर सू.मुनाफिकून)
१०) अर्थ हा आहे की, मुहाजिरीनचा अन्नदाता अल्लाहतआला आहे. यासाठी की अन्नाचे खजीने त्याच्याचजवळ आहेत. तो ज्याला जेवढे इच्छील, तेवढे देईल आणि ज्याच्यापासून इच्छील त्याच्यापासून अडवून घेईल.
११) दांभिक लोक या वास्तविकतेला जाणत नाही, म्हणून ते समजतात की, अन्सार जर महाजिरीनची मदत करणार नाहीत, तर ते उपाशी मरून जातील.
१२) असे म्हणणारा, दांभिकांचा सरदार अब्दुल्लाह् बिन उबई होता. प्रतिष्ठीत लोकांनी त्याला अभिप्रेत होते, तो स्वत: आणि त्याचे साथीदार आणि अप्रतिष्ठीत लोकांनी (नाऊजो बिल्लाह्) रसूलुल्लाह् ﷺ आणि मुसलमान.
१३) म्हणजे प्रतिष्ठा आणि वर्चस्व फक्त एका अल्लाहसाठी आहे. आणि मग तो आपल्याकडून ज्याला इच्छील प्रतिष्ठा आणि वर्चस्व बहाल करील. म्हणून तो आपले पैगंबर आणि त्यांच्यावर ईमान आणणाऱ्यांना प्रतिष्ठा आणि वर्चस्व बहाल करीतो. न की, त्यांना, जे त्याचे आज्ञाभंजक असतील. हे दांभिक लोकांच्या म्हणण्याचे खंडन केले की, प्रतिष्ठेचा मालक फक्त अल्लाहतआला आहे. आणि प्रतिष्ठित पण तोच आहे, ज्याला तो प्रतिष्ठीत समजेल. न की तो, जो आपल्या स्वत:ला किंवा दुनियाचे लोक ज्याला प्रतिष्ठीत समजतील. आणि अल्लाहजवळ प्रतिष्ठीत फक्त आणि फक्त ईमानवालेच असतील. काफिर आणि दांभिक नाही.
१४) म्हणून ते अशी कामे करीत नाहीत, जी त्यांच्यासाठी फायदेकार आहेत. आणि त्या गोष्टींपासून वांचत नाही, ज्या त्याच्यासाठी फायदेकारक नाही.
१५) म्हणजे धन दौलत आणि संततीचे प्रेम तुमच्यावर एवढे प्रबळ न होऊन जावे, की तुम्ही अल्लाहने सांगितलेल्या आदेश आणि कर्तव्यांकडून गाफील होऊन जावे. आणि अल्लाहने निश्चित केलेल्या हराम आणि हलालच्या मर्यादांची पर्वा करू नये. दांभिकांच्या उल्लेखानंतर लगेच, या तंबीचा उद्देश्य हा आहे की, हे दांभिकांचे कर्तृत्व आहे, जे मनुष्याला तोट्यांत टाकणारे आहे. ईमानवाल्यांचे कर्तृत्व याच्या उलट असते. आणि ते हे आहे की, ते नेहमी अल्लाहचे स्मरण ठेवतात. म्हणजे त्याचे आदेश आणि कर्तव्यांवर नियमित कर्मरत रहाणे आणि हलाल आणि हरामच्या दर्म्यान ओळख बाळगतात.
१६) खर्च करण्याने अभिप्रेत, जकात अदा करणे, आणि दुसऱ्या भलाईच्या कामांत खर्च करणे आहे.
१७) याच्याने ठाऊक झाले की, जकात अदा करणे; आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करण्यांत आणि अशाच प्रकारे हज्ज करण्याची क्षमता असल्यांस, त्याच्या अदा करण्यात मुळीच उशीर करता कामा नये. यासाठी की मृत्युचा काही पत्ता नाही की, कोणत्यावेळी येऊन लागेल आणि या फर्ज गोष्टी त्याच्या शिरावर बाकी राहून जाव्यांत. कारण की मृत्युच्यावेळी आकांक्षा करण्याचा काही फायदा नाही.

وَلَنْ يُّؤَخِّرَ اللّٰهُ نَفْسًا اِذَا جَآءَ اَجَلُهَا ؕ وَاللّٰهُ خَبِيْرٌۢ بِمَا تَعْمَلُوْنَ ﴿۱۱﴾

आणि जेव्हा कोणाच्या आयुष्याची मुदत पूर्ण होऊन जाते, तर मग त्याला अल्लाहतआला मुळीच अवकाश देत नाही; आणि जे काही तुम्ही करीत आहात, अल्लाहतआला त्याच्याशी चांगल्या प्रकारे वाकबगार आहे. (११)

१४

اٰياتها ١٨ | (٦٤) سُوْرَةُ التَّغَابُنِ مَدَنِيَّةٌ (١٠٨) | رُكُوْعَاتُهَا ٢

महावाक्ये १८ | **(६४) सू. अत्तगाबुन** | रुकूअ २

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يُسَبِّحُ لِلّٰهِ مَا فِى السَّمٰوٰتِ وَمَا فِى الْاَرْضِ ۚ لَهُ الْمُلْكُ وَلَهُ الْحَمْدُ ؗ وَهُوَ عَلٰى كُلِّ شَىْءٍ قَدِيْرٌ ﴿۱﴾

आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तू अल्लाहचे पावित्र्य वर्णन करीत आहे.[१] त्याचेच राज्य आहे आणि त्याच्याचसाठी स्तुती[२] आहे आणि तो सर्व वस्तूंवर सामर्थ्यवान आहे. (१)

هُوَ الَّذِىْ خَلَقَكُمْ فَمِنْكُمْ كَافِرٌ وَّمِنْكُمْ مُّؤْمِنٌ ؕ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ بَصِيْرٌ ﴿۲﴾

त्यानेच तुम्हास निर्माण केले आहे; तर तुमच्यातून कोणी तर काफिर आहे आणि काही तर ईमानवाले आहेत आणि जे काही तुम्ही करीत आहांत, ते अल्लाहतआला फार चांगल्याप्रकारे पाहत आहे.[३] (२)

خَلَقَ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضَ بِالْحَقِّ وَصَوَّرَكُمْ فَاَحْسَنَ صُوَرَكُمْ ۚ وَاِلَيْهِ الْمَصِيْرُ ﴿۳﴾

त्यानेच आकाश आणि पृथ्वीला सत्त्य संकल्पाने निर्माण केले आहे.[४] त्यानेच तुमचे चेहरे बनविले[५] आणि फार चांगले बनविले आणि त्याच्याचकडे परतून जाणे आहे.[६] (३)

يَعْلَمُ مَا فِى السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَيَعْلَمُ مَا تُسِرُّوْنَ وَمَا تُعْلِنُوْنَ ؕ وَاللّٰهُ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ﴿۴﴾

तो आकाश आणि पृथ्वीच्या प्रत्येक गोष्टीचे ज्ञान बाळगतो आणि जे काही लपवाल आणि जे जाहीर कराल तो ते (सर्व काही) जाणतो. अल्लाह तर मनांतील गोष्टी सुद्धा जाणणारा आहे.[७] (४)

१) म्हणजे आकाश आणि पृथ्वीची प्रत्येक वस्तू, अल्लाहतआलाचे प्रत्येक दोषापासून पवित्र असणे वर्णन करते. जसे की पूर्वी येऊन चुकले.

२) म्हणजे हे दोन्ही गुण पण त्याच्याच करीता खास आहेत. जर कोणाला काही अधिकार प्राप्त असेल, तर तो त्यानेच प्रदान केलेला आहे, जो तात्पुरत्या स्वरुपांत आहे. कोणाजवळ काही रुपसौंदर्य आहे तर त्याचीच कृपा आहे. म्हणून खरा स्तुतीस पात्रसुद्धा फक्त तोच आहे.

३) म्हणजे मनुष्यांकरीता भले आणि वाईट, पुण्य आणि पाप व कुफ्र आणि ईमानच्या मार्गांचा खुलासा केल्यानंतर अल्लाहने मनुष्याला इरादा आणि अंगीकाराचे जे स्वातंत्र्य दिले आहे त्याच्या अनुषंगाने कोणी कुफ्रचा तर कोणी ईमानाचा मार्ग अनुसरला आहे. त्याने कोणावर सक्ती केलेली नाही. जर त्याने सक्ती केली असती, तर कोणी मनुष्याने कुफ्र आणि पापाचा मार्ग अनुसरण्यांस समर्थच झाला नसतां. परंतु अशाप्रकारे माणसाची कसोटी घेणे शक्य झाले नसते, जेव्हा की अल्लाहतआलाची मर्जी मनुष्याची कसोटी घेण्याची होती. ''ज्याने मृत्यु आणि जीवनाला यासाठी निर्माण केले की, तुमची कसोटी घ्यावी, की तुमच्यातून चांगली कामे कोण करीतो''? (सू. मुल्क २) ज्या प्रकारे काफिराचा निर्माता अल्लाह आहे. कुफ्रचा निर्मातापण अल्लाहच आहे. परंतु हे कुफ्र त्या काफिरांचे कर्म आणि कमाई आहे, ज्याने त्याला आपल्या इराद्याने अंगीकारले आहे. अशाचप्रकारे ईमान आणि ईमानवाल्यांचा निर्माता पण अल्लाहच आहे. परंतु ईमान त्या ईमानवाल्यांचे कर्म आणि कमाई आहे, ज्याने त्याला अंगीकारले आहे आणि या कमाई आणि कर्मावर उभयतांना त्यांच्या कर्मानुसार मोबदला मिळेल कारण की तो सर्वांची कर्मे पहात आहे.

४) आणि तो न्याय आणि युक्ती हीच आहे की, पुण्यकर्त्याला त्याच्या पुण्याचा आणि पाप्याला त्याच्या पापाचा मोबदला द्यावा. म्हणून तो न्यायाची पूर्ण अंमलबजावणी कयामतच्या दिवशी करील.

५) तुमची चेहरेपट्टी, अंगकाठी आणि चेहरा मोहरा फारच सुंदर बनविला. ज्यापासून अल्लाहची दुसरी सृष्टी वंचित आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले ''हे मनुष्य! तुला आपल्या कृपाळू पालनकर्त्याकडून कोणत्या गोष्टीने बहकविले? ज्या पालनकर्त्याने तुला निर्माण केले, मग ठिकठाक केले मग दुरुस्त आणि बरोबर केले. ज्या रुपात तुला इच्छीले, ढाळले. (सू.इन्फतार ६-८) ''आणि तुमचे चेहरे बनविले आणि फारच चांगले बनविले. आणि तुम्हांस चांगल्या चांगल्या वस्तू खावयास दिल्यांत'' (सू.मोमिन-६४)

६) कोण्या दुसऱ्याकडे नाही की, अल्लाहच्या विचारपुस आणि पकडीपासून बचाव होऊन जावो.

७) म्हणजे त्याचे ज्ञान आकाश आणि पृथ्वीला सर्वांना घेरून आहे. किंबहुना तुमच्या मनांतील गुप्तभेदांना सुद्धा तो जाणतो. याच्यापूर्वी जे वायदे आणि धमक्या दिल्या गेल्या आहेत, ही त्यांची ताकीद आहे.

أَلَمْ يَأْتِكُمْ نَبَؤُا الَّذِينَ كَفَرُوا مِن قَبْلُ فَذَاقُوا وَبَالَ أَمْرِهِمْ وَلَهُمْ عَذَابٌ أَلِيمٌ ⑤

काय तुमच्यापर्यंत यांच्या पूर्वीच्या काफिरांची खबर पोहोचली नाही? ज्यांनी आपल्या कर्मांच्या दुष्परीणामांची गोडी चाखली;[१] आणि ज्यांच्याकरीता दु:खदायक शिक्षा आहे.[२] ⑤

ذَٰلِكَ بِأَنَّهُ كَانَت تَّأْتِيهِمْ رُسُلُهُم بِالْبَيِّنَاتِ فَقَالُوا أَبَشَرٌ يَهْدُونَنَا فَكَفَرُوا وَتَوَلَّوا وَّاسْتَغْنَى اللَّهُ وَاللَّهُ غَنِيٌّ حَمِيدٌ ⑥

हे यासाठी[३] की, यांच्याजवळ यांचे पैगंबर स्पष्ट प्रमाणे घेऊन आलेत; तेव्हा ते म्हणाले की काय, मनुष्य आम्हाला सन्मार्ग दाखविणार?[३] सारांश त्यांनी नाकारले[४] आणि तोंड फिरवून[५] घेतले; आणि अल्लाहने पण पर्वा केली नाही[६] आणि अल्लाह तर आहेच फार निरपेक्ष[७] सुस्तुत्य[८] ⑥

زَعَمَ الَّذِينَ كَفَرُوا أَن لَّن يُبْعَثُوا قُلْ بَلَىٰ وَرَبِّي لَتُبْعَثُنَّ ثُمَّ لَتُنَبَّؤُنَّ بِمَا عَمِلْتُمْ وَذَٰلِكَ عَلَى اللَّهِ يَسِيرٌ ⑦

या काफिरांनी विचार केला आहे की, ते दुसऱ्यांदा जिवंत केले जाणार नाही.[९] आपण सांगून द्या की का नाही, अल्लाहची शपथ! तुम्ही अवश्य दुसऱ्यांदा जिवंत केले जाल.[१०] मग जे तुम्ही केले आहे ते तुम्हांस कळविले जाईल[११] आणि अल्लाहसाठी हे फारच सोपे आहे.[१२] ⑦

१) हे मक्केवाल्यांना विशेषकरून आणि अरबाच्या काफिरांना सर्व साधारणपणे, संबोधन आहे आणि पूर्वीच्या काफिरांनी अभिप्रेत नूह, आद आणि समूद वगैरेंचे लोक आहेत. ज्यांना त्यांच्या कुफ्र आणि अपराधांमुळे जगांत शिक्षेत ग्रस्त करून नष्ट करून टाकण्यात आले.

२) म्हणजे ऐहिक शिक्षेशिवाय परलोकांत सुद्धा.

३) 'जालेका' हा इशारा आहे, त्या शिक्षेकडे जी जगांत त्यांना मिळाली आणि परलोकांत सुद्धा मिळेल.

४) हे त्यांच्या कुफ्रचे कारण आहे की, त्यांनी हे कुफ्र जे यांच्या दोन्ही जगतांत शिक्षेला कारणीभूत बनले; यासाठी अंगीकारले की, त्यांनी एका मनुष्याला आपला सन्मार्गदर्शक मानण्यापासून इन्कार केला. म्हणजे एका मनुष्याचे पैगंबर बनून, लोकांना सन्मार्ग दर्शनाकरीता येणे, यांच्याकरता मान्य करण्यायोग्य नव्हते. जसे की आज बिदअतवाल्यांना पैगंबरांना मनुष्य मानणे फारच भारी वाटते.

५) म्हणून या कारणाने त्यांनी, पैगंबरांना पैगंबर माणण्यापासून आणि त्यांच्यावर ईमान आणण्यापासून नकार देऊन टाकला.

६) म्हणजे त्यांच्यापासून विमुख झाले आणि जे आवाहन ते करत होते; त्यावर त्यांनी चिंतन आणि मननच केले नाही.

७) म्हणजे त्यांच्या ईमान आणि त्यांच्या उपासनेमुळे.

८) त्याला कोणाच्या उपासनेपासून काय फायदा आणि त्याच्या उपासनेपासून इन्कार करण्याने काय नुकसान?

९) किंवा महमूद आहे. (स्तुती केला गेलेला) सर्व सृष्टीच्याकडून म्हणजे प्रत्येक सृष्टी आपल्या स्थितीने आणि म्हणण्याने, त्याच्या स्तुती आणि गौरवांत मग्न आहे.

१०) म्हणजे ही धारणा की कयामतच्या दिवशी दुसऱ्यांदा जिवंत केले जाणार नाही, ही काफिरांची निव्वळ कल्पना आहे. ज्याला काही प्रमाण नाही.

११) कुरआन मजीदमध्ये तीन ठिकाणी अल्लाहतआलाने आपल्या पैगंबराला हा हुकूम दिला की, त्याने आपल्या पालनकर्त्याची शपथ वाहून ही घोषणा करावी की, अल्लाहतआला अवश्य दुसऱ्यांदा जिवंत करील. यांच्यातून हे एक ठिकाण आहे. याच्यापूर्वी एक ठिकाण सू.यूनुस आ.५३ आणि दुसरे ठिकाण सू.सबा आ.३ आहे.

१२) हे कयामतच्या घडून येण्याचे प्रयोजन आहे की, शेवटी अल्लाहतआला सर्व माणसांना दुसऱ्यांदा का जिवंत करील? यासाठी की, तेथे प्रत्येकाला त्याच्या कर्माचा मोबदला दिला जावा. कारण की जगांत आम्ही पाहतो की, हा मोबदला पूर्णपणे सर्वसाधारणपणे मिळत नाही, न सदाचरणीला न दुराचरणीला. आता जर कयामतच्या दिवशीपण संपूर्ण मोबदल्याची व्यवस्था न झाली, तर जग एक भग्नावशेषांचा खेळ आणि एक निरर्थक कृत्यच ठरेल. जेव्हा की अल्लाहचे व्यक्तीत्व अशा (निरर्थक) गोष्टींकडून फारच उच्च आहे. त्याचे तर कुठलेही काम निरर्थक नाही. तर का म्हणून जिन्नात आणि मनुष्याच्या निर्मितीला निरुद्देश्य आणि एक खेळ समजून घेतले जावे? अल्लाहतआला यापेक्षा अति उच्च आहे.

१३) हे दुसऱ्यांदा जीवन, माणसांना कितीका कठीण वाटत असेना, परंतु अल्लाह करीता हे फार सोपे आहे.

فَاٰمِنُوْا بِاللّٰهِ وَرَسُوْلِهٖ وَالنُّوْرِ الَّذِيْٓ اَنْزَلْنَا ۭ وَاللّٰهُ بِمَا تَعْمَلُوْنَ خَبِيْرٌ ⑧

**तर तुम्ही अल्लाहवर त्याच्या पैगंबरावर[१] आणि या प्रकाशावर, ज्याला आम्ही अवतरीत केले आहे, ईमान आणा[२] आणि अल्लाहतआला तुमच्या प्रत्येक कर्मांशी वाकबगार आहे. ⑧**

يَوْمَ يَجْمَعُكُمْ لِيَوْمِ الْجَمْعِ ذٰلِكَ يَوْمُ التَّغَابُنِ ۭ وَمَنْ يُّؤْمِنْۢ بِاللّٰهِ وَيَعْمَلْ صَالِحًا يُّكَفِّرْ عَنْهُ سَيِّاٰتِهٖ وَيُدْخِلْهُ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ۭ ذٰلِكَ الْفَوْزُ الْعَظِيْمُ ⑨

**ज्या दिवशी तुम्हांसर्वांस त्या जमा होण्याच्या दिवशी[३] जमा करील, तो हाच दिवस आहे हार जीत चा;[४] आणि जो मनुष्य अल्लाहवर ईमान आणून, चांगली कामे करील, अल्लाह त्याच्यापासून त्याची पापे दूर करून टाकेल, आणि त्याला स्वर्गात घेऊन जाईल, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वाहत आहेत. ज्यांत ते नित्य निरंतर राहतील. हेच फार मोठे साफल्य आहे. ⑨**

وَالَّذِيْنَ كَفَرُوْا وَكَذَّبُوْا بِاٰيٰتِنَآ اُولٰۗىِٕكَ اَصْحٰبُ النَّارِ خٰلِدِيْنَ فِيْهَا ۭ وَبِئْسَ الْمَصِيْرُ ⑩

**आणि ज्या लोकांनी नाकारले आणि आमच्या निशाण्यांस खोटे ठरवले ते (सर्व) नर्कवासीय आहेत; जे नर्काग्नीमध्ये नित्य निरंतन राहतील आणि ती फारच वाईट जागा आहे. ⑩**

مَآ اَصَابَ مِنْ مُّصِيْبَةٍ اِلَّا بِاِذْنِ اللّٰهِ ۭ وَمَنْ يُّؤْمِنْۢ بِاللّٰهِ يَهْدِ قَلْبَهٗ ۭ وَاللّٰهُ بِكُلِّ شَيْءٍ عَلِيْمٌ ⑪

**कोणतीही आपत्ती अल्लाहच्या परवानगीशिवाय ओढवूंशकत नाही.[५] जो कोणी अल्लाहवर ईमान आणेल. अल्लाह त्याच्या अंत:करणाला मार्ग (हिदायत) सूचवितो.[६] आणि अल्लाह सर्व ज्ञानी आहे. ⑪**

وَاَطِيْعُوا اللّٰهَ وَاَطِيْعُوا الرَّسُوْلَ ۚ فَاِنْ تَوَلَّيْتُمْ فَاِنَّمَا عَلٰي رَسُوْلِنَا الْبَلٰغُ الْمُبِيْنُ ⑫

**(लोकांनो!) अल्लाहचे आज्ञापालन करा आणि पैगंबराचे आज्ञापालन करा. मग जर (तुम्ही) तोंड फिरवाल तर आमच्या पैगंबराकडे फक्त स्पष्ट स्पष्ट पोहचवूंन देणे आहे.[७] ⑫**

१) म्हणजे जेव्हा मामला अशाप्रकारे आहे जो सांगितला गेला, तर अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान आणा त्याला मान्य करा.

२) आपल्यासह अवतरीत होणारा प्रकाश कुरआन मजीद आहे. ज्याने आज्ञानाचा अंधकार दूर होतो आणि ईमानाचा प्रकाश फैलावतो.

२) कयामतला 'यौमुल जमअ' यासाठी म्हटले की, त्या दिवशी पूर्वीचे आणि शेवटचे सर्व एकाच मैदानांत जमा होतील. देवदूत बोलावील, तर सर्व त्याचा आवाज ऐकतील. प्रत्येकाची नजर शेवटपर्यंत पोहचून जाईल. कारण दर्म्यानमध्ये कुठलीही वस्तूंआडवी येणार नाही. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''आपण सांगून द्या की, खचित्च सर्व पूर्वीचे आणि मागील अवश्य गोळा केले जातील. एका निश्चित केलेल्या दिवसाच्या वेळेवर.'' (सू.वाकिअ:४९/५०)

४) म्हणजे एक पक्ष जिंकून जाईल, आणि एक हारून जाईल. सत्त्यवादी असत्यवादीवर, ईमानवाले काफिरांवर आज्ञाधारक, आज्ञाभंजकांवर जिंकून जातील. सर्वात मोठा विजय ईमानवाल्यांना हा प्राप्त होईल की, ते स्वर्गांत दाखल होऊन जातील आणि तेथे त्या घरांचे सुद्धा ते मालक बनून जातील, जे नरकाग्नीवाल्यांसाठी होते, जर ते नरकाग्नीत जाणारे काम न करते. आणि सर्वात मोठा पराजय नर्कवासियांच्या वाट्याला येईल, जे नरकाग्नीत दाखल होतील. ज्यांनी भलाईला वाईटाने, उत्कृष्ट वस्तुला रद्दीने, आणि देणग्यांना शिक्षेने बदलून घेतले. 'गबन' चा अर्थ नुकसान आणि तोट्याचा पण आहे. म्हणजे नुकसानीचा दिवस. या दिवशी काफिरांनातर जाट्याची ताणीव होईलच; पण ईमानवाल्यांना सुद्धा या अनुषंगाने तोट्याची जाणीव होईल की, त्यांनी आणखी जास्त पुण्य करून आणखी दर्जे का प्राप्त करून घेतले नाहीत ?

५) म्हणजे या दैव आणि मर्जीनेच त्याचे अस्तित्व जाणवते. काही म्हणतात याच्या अवतरणाचे कारण, काफिरांचे हे म्हणणे आहे की, जर मुसलमान सत्त्यावर असते तर जगांतील संकटे त्यांच्यावर आली नसती. (फत्हुल कदीर)

६) म्हणजे तो जाणून घेतो की, त्याला जे काही मिळाले आहे, अल्लाहची मर्जी आणि त्याच्या हुकूमानेच मिळाले आहे. तर मग तो यावर सहनशिलता पत्करतो आणि दैवावर राजी असल्याचे जाहीर करतो. इब्ने अब्बास رضي الله عنه फर्मावितात, त्याच्या अंत:करणात विश्वास पक्का करून देतो, ज्याने तो जाणून घेतो की, त्याला मिळणारी वस्तू त्याच्यापासून चुकू शकत नाही. आणि जी याच्यापासून चुकून जाणार आहे, ती त्याला मिळूंशकत नाही. (इब्ने कसीर)

७) म्हणजे आमच्या पैगंबराचे याच्याने काही बिघडू शकत नाही. कारण की याचे काम फक्त धर्मप्रचार आहे, इमाम जहरी म्हणतात, अल्लाहचे काम पैगंबर पाठविणे आहे. पैगंबराचे काम धर्मप्रचार आणि लोकांचे काम याला मान्य करणे आहे. (फत्हुल कदीर)

اَللّٰهُ لَاۤ اِلٰهَ اِلَّا هُوَ ؕ وَعَلَى اللّٰهِ فَلْيَتَوَكَّلِ الْمُؤْمِنُوْنَ ﴿۱۳﴾

**अल्लाहशिवाय अन्य कोणी खराखुरा उपास्य नाही; आणि ईमानवाल्यांना अल्लाहवरच भरवंसा ठेवावयास पाहिजे.** [१] ⑬

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْۤا اِنَّ مِنْ اَزْوَاجِكُمْ وَاَوْلَادِكُمْ عَدُوًّا لَّكُمْ فَاحْذَرُوْهُمْ ۚ وَاِنْ تَعْفُوْا وَتَصْفَحُوْا وَتَغْفِرُوْا فَاِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ﴿۱۴﴾

**अहो ईमानवाल्यांनो! तुमच्या काही पत्न्या आणि काही मुले तुमचे शत्रु आहेत.** [२] **(खबरदार!) त्यांच्यापासून सावध रहा** [३] **आणि जर तुम्ही माफ कराल, आणि गय कराल आणि क्षमा कराल, तर अल्लाहतआला (सुद्धा) क्षमाकर्ता आणि दयाळू आहे.** [४] ⑭

اِنَّمَاۤ اَمْوَالُكُمْ وَاَوْلَادُكُمْ فِتْنَةٌ ؕ وَاللّٰهُ عِنْدَهٗۤ اَجْرٌ عَظِيْمٌ ﴿۱۵﴾

**तुमची धनदौलत आणि संतती तर निव्वळ तुमची कसोटी आहे** [५] **आणि फार मोठा मोबदला अल्लाहजवळ आहे.** [६] ⑮

فَاتَّقُوا اللّٰهَ مَا اسْتَطَعْتُمْ وَاسْمَعُوْا وَاَطِيْعُوْا وَاَنْفِقُوْا خَيْرًا لِّاَنْفُسِكُمْ ؕ وَمَنْ يُّوْقَ شُحَّ نَفْسِهٖ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْمُفْلِحُوْنَ ﴿۱۶﴾

**म्हणून तुमच्याने होईल तितके अल्लाहला भित रहा आणि ऐकत रहा व मानत जा** [७] **आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करीत रहा. जे तुमच्याकरीता उत्तम आहे** [८] **आणि जो मनुष्य आपल्या स्वाभाविक कृपणपणापासून सुरक्षित राखला जाईल, तर तोच सफल आहे.** ⑯

اِنْ تُقْرِضُوا اللّٰهَ قَرْضًا حَسَنًا يُّضٰعِفْهُ لَكُمْ وَيَغْفِرْ لَكُمْ ؕ وَاللّٰهُ شَكُوْرٌ حَلِيْمٌ ﴿۱۷﴾

**जर तुम्ही अल्लाहला उत्कृष्ट कर्ज द्याल (म्हणजे त्याच्या मार्गात खर्च कराल)** [९] **तर तो त्याला तुमच्या करीता वाढवित जाईल आणि तुमचे अपराध पण क्षमा करून टाकेल.** [१०] **अल्लाह मोठाच गुणग्राहक, मोठा दर्याद्र आहे.** [११] ⑰

عٰلِمُ الْغَيْبِ وَالشَّهَادَةِ الْعَزِيْزُ الْحَكِيْمُ ﴿۱۸﴾

**तो अदृष्ट आणि दृष्टाचा जाणणारा आहे सामर्थ्यवान (व) बुद्धीमान आहे** ⑱

१) म्हणजे सर्व प्रकरणे त्यालाच सोपवावीत; त्याच्यावर भरोसा ठेवावा आणि फक्त त्याच्याशी दुआ आणि विनविण्या कराव्यांत. कारण की, त्याच्याशिवाय अन्य कोणी इच्छापूर्ती करणारा आणि संकटनिवारक नाहीच.

२) म्हणजे जो तुम्हास चांगली कामे आणि अल्लाहच्या आज्ञापालनापासून मना करेल, समजून घ्या तो तुमचा हितचिंतक नाही, शत्रू आहे.

३) म्हणजे त्यांच्या मागे लागण्यापासून वांचा, किंबहुना त्यांना आपल्यामागे लावा. कारण की, त्यांनी सुद्धांअल्लाहचे आज्ञापालन स्वीकारावे. न की, तुम्ही त्यांच्या मागे लागून आपला परलोक खराब करून घ्यावा.

४) याच्या अवतरणाचे कारण हे सांगण्यात आले आहे की, मक्केमध्ये मुसलमान होणाऱ्या काही मुसलमानांनी मक्का सोडून मदीनेला येण्याचा इरादा केला. जसा की त्यावेळी हिजरतचा हुकूम फारच ताकदीने दिला गेला होता. परंतु त्यांच्या पत्न्या आणि मुले आडवी आलीत; आणि त्यांनी त्यांना हिजरत करू दिली नाही. नंतर जेव्हा ते रसूलुल्लाह ﷺ जवळ येऊन गेलेत, तेव्हा त्यांनी पाहिले की, त्यांच्यापूर्वी येणाऱ्यांनी, धर्मामध्ये फार जास्त समझ प्राप्त करून घेतली आहे. तेव्हा त्यांना आपल्या बायका पोरांवर फार राग आला; ज्यांनी त्यांना हिजरत करण्यापासून अडवून ठेवले होते. म्हणून त्यांनी यांना शिक्षा देण्याचा इरादा केला. अल्लाहने याच्यात त्यांना क्षमा करणे आणि गय करण्याने काम घेण्याचा उपदेश केला. (तिर्मिझी तफसीर सू.तगाबुन)

५) जे तुम्हांस हरामाच्या कमाईवर उभारतात, आणि अल्लाहचे हक्क अदा करण्यापासून मना करतात; तर या कसोटीत तुम्ही त्याचवेळी यशस्वी होऊ शकतात, जेव्हा तुम्ही अल्लाहच्या आज्ञाभंजनात त्याचे आज्ञापालन करू नये. अर्थ हा झाला की, धनदौलत आणि संतती जेथे अल्लाहची देणगी आहे. तेथेच ती मनुष्याचे कसोटी घेण्याचे साधन सुद्धा आहे. अशाप्रकारे अल्लाहतआला पहातो की माझा आज्ञाधारक कोण आहे आणि आज्ञाभंजक कोण?

६) म्हणजे त्या माणसाकरीता जो धनदौलत आणि संपत्तीच्या प्रेमाच्या मुकाबल्यात अल्लाहच्या आज्ञापालनाला प्राधान्य देतो आणि त्याच्या गुन्ह्याच्या कामांपासून वाचतो.

७) म्हणजे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या गोष्टी लक्षपूर्वक ध्यान देऊन ऐका आणि त्यावर अंमलबजावणी करा. कारण की, फक्त ऐकून घेणे फायदेकारक नाही. जो पर्यंत त्यावर अंमलबजावणी होणार नाही.

८) 'ईनफाक' सर्व साधारण आहे, त्याच्यात जकात आणि नफील दानधर्म दोन्ही शामील आहेत.

९) म्हणजे 'इखलासे नियत' आणि मनाच्या दिलखुषी बरोबर, अल्लाहच्या मार्गात खर्च कराल.

१०) म्हणजे किती तरी पट वाढवून देण्याबरोबरच तो तुमचे अपराध पण क्षमा करून टाकील.

११) तो आपल्या आज्ञाधारकांना, वाढवून वाढवून पुण्यप्रतिफल देत असतो. आणि गुन्हेगारांची लगेच पकड करीत नाही

آياتها ١٢ (٦٥) سُوْرَةُ الطَّلَاقِ مَدَنِيَّةٌ (٩٩) رکوعاتها ٢

महावाक्ये १२ | रुकूअ २

# (६५) सू. अत्तलाक

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يٰٓاَيُّهَا النَّبِيُّ اِذَا طَلَّقْتُمُ النِّسَآءَ فَطَلِّقُوْهُنَّ
لِعِدَّتِهِنَّ وَ اَحْصُوا الْعِدَّةَ ۚ وَاتَّقُوا اللّٰهَ رَبَّكُمْ ۚ
لَا تُخْرِجُوْهُنَّ مِنْۢ بُيُوْتِهِنَّ وَ لَا يَخْرُجْنَ
اِلَّآ اَنْ يَّاْتِيْنَ بِفَاحِشَةٍ مُّبَيِّنَةٍ ؕ وَ تِلْكَ
حُدُوْدُ اللّٰهِ ؕ وَمَنْ يَّتَعَدَّ حُدُوْدَ اللّٰهِ فَقَدْ
ظَلَمَ نَفْسَهٗ ؕ لَا تَدْرِيْ لَعَلَّ اللّٰهَ يُحْدِثُ
بَعْدَ ذٰلِكَ اَمْرًا ۝١

**अहो पैगंबरा! (आपल्या उम्मतीला सांगून द्या) जेव्हा तुम्ही आपल्या पत्नींना तलाक देऊ[१] इच्छाल, तर त्यांना त्यांच्या इद्दतीत तलाक[२] द्या. आणि इद्दतचा हिशेब[३] ठेवा आणि अल्लाह जो तुमचा पालनकर्ता आहे, त्याला भीत रहा. न तुम्ही त्यांना त्यांच्या घरांतून काढा, आणि[४] न त्यांनी (स्वत:च) निघावे,[५] पण ही आणखी गोष्ट आहे की त्या उघडपणे निर्लज्जपणा (चे काम) करून बसतील;[६] या अल्लाहच्या बांधीव मर्यादा आहेत. जो मनुष्य अल्लाहच्या (बांधीव) मर्यादेच्या पुढे निघून जाईल, त्याने खचित्च आपल्यावर जुलूम केला.[७] तुम्ही जाणत नाही, कदाचित् याच्या नंतर अल्लाहतआलाने कोणी नवी गोष्ट निर्माण करून द्यावी.[८] ①**

فَاِذَا بَلَغْنَ اَجَلَهُنَّ فَاَمْسِكُوْهُنَّ بِمَعْرُوْفٍ
اَوْ فَارِقُوْهُنَّ بِمَعْرُوْفٍ وَّاَشْهِدُوْا ذَوَيْ عَدْلٍ
مِّنْكُمْ وَاَقِيْمُوا الشَّهَادَةَ لِلّٰهِ ؕ ذٰلِكُمْ يُوْعَظُ
بِهٖ مَنْ كَانَ يُؤْمِنُ بِاللّٰهِ وَالْيَوْمِ الْاٰخِرِ ۬ۙ
وَمَنْ يَّتَّقِ اللّٰهَ يَجْعَلْ لَّهٗ مَخْرَجًا ۝٢

**मग जेव्हा या स्त्रिया आपल्या इद्दती पूर्ण करण्याच्या जवळ पोहचून जातील, तेव्हा त्यांना एक तर कायद्याप्रमाणे आपल्या विवाहबंधनात राहू द्या; किंवा दस्तूराप्रमाणे त्यांना वेगळे करा.[९] आणि आपसांत दोन न्यायनिष्ठ माणसांना साक्षी बनवून घ्या;[१०] आणि अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी ठीक ठीक साक्ष द्या.[११] हेच आहे ते, ज्याचा उपदेश त्याला केला जातो, जो अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान ठेवीत असेल आणि जो मनुष्य अल्लाहला भितो, त्याच्याकरीता अल्लाह सुटकेचा मार्ग काढून देतो.[१२] ②**

وَّيَرْزُقْهُ مِنْ حَيْثُ لَا يَحْتَسِبُ ؕ وَمَنْ يَّتَوَكَّلْ
عَلَى اللّٰهِ فَهُوَ حَسْبُهٗ ؕ اِنَّ اللّٰهَ بَالِغُ اَمْرِهٖ ؕ قَدْ جَعَلَ
اللّٰهُ لِكُلِّ شَيْءٍ قَدْرًا ۝٣

**आणि त्याला अशा ठिकाणावरून अन्न देतो, जेथून त्याला गुमानही नसावा. आणि जो मनुष्य अल्लाहवर भरवंसा ठेवील, अल्लाह त्याला पूरेसा होईल. अल्लाहतआला आपले काम पूर्ण करूनच राहील.[१३] अल्लाहतआलाने प्रत्येक वस्तूचा एक अंदाच ठरवून ठेवला आहे.[१४] ③**

१) नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला संबोधन, त्यांची प्रतिष्ठा आणि मर्तब्यामुळे आहे. नाहीतर हुकूम तर सर्व उम्मतला दिला जात आहे किंवा आपल्याला (सल्ल.) विशेष म्हणून संबोधित केले आहे आणि 'जमा' चा सेगा आदर सन्मान म्हणून आहे आणि उम्मतकरीतांआपला नमुनाच पुरेसा आहे, 'तल्लकतुम्' चा अर्थ आहे, जेव्हा तलाक देण्याचा पक्का इरादा करून घ्याल.

२) याच्यांत तलाक देण्याची पद्धत आणि वेळ सांगण्यात आली आहे. इद्दतीच्या प्रारंभी तलाक द्या. म्हणजे जेव्हा स्त्री ऋतुस्त्रावाहून पाकसाफ होऊन जाईल, तेव्हा तिच्याशी शैय्या सोबत केल्याशिवाय, तलाक द्या. मासिक पाळी संपल्यानंतर इद्दतची सुरुवात होते. याचा अर्थ असा आहे की, ऋतुस्त्रावाच्या अवस्थेत किंवा संभोग केल्यानंतर तलाक देणे चुकीची पद्धत आहे. याला 'फुकहा' 'तलाके बिदई' ने, आणि पहिल्या (योग्य) पद्धतीला 'तलाके सुन्नत' ने संबोधित करतात. याचे समर्थन त्या हदीसने होते ज्यात येते की, ह.इब्ने उमर رضي الله عنه नी ऋतुस्त्रावाच्या स्थितीत आपल्या पत्नीला तलाक देऊन टाकला; तेव्हा रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम क्रोधायमान झाले. आणि त्यांनी तिला रूजु करण्याबरोबरच हुकूम दिला की, ऋतुस्त्रावांतून पाकसाफ झाल्यानंतर तिला तलाक द्यावा आणि यासाठी आपण सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी या महावाक्याला प्रमाण मानले. (स.बुखारी, किताबुल तलाक) तथापि ऋतुस्त्रावांत दिलेला तलाक सुद्धां, तलाके बिदई असून सुद्धा, तलाक होऊन जाईल. मुहद्देसीन आणि बहुतेक धर्मपंडित, याच गोष्टीला मानतात. तथापि इमाम इब्ने कय्यिम आणि ईमाम इब्ने तैमिया, तलाके बिदईच्या तलाक होऊन जाण्याला मान्य करीत नाही. (तपशीला करीता पहावे, नैलूल अवतार)

३) म्हणजे इच्या सुरवातीकडे आणि शेवटाकडे लक्ष द्या. कारण की स्त्रीने याच्यानंतर दुसरा निकाह करू शकावा.

किंवा जर तुम्हीच रूजुअ करू इच्छित असाल (पहिल्या आणि दुसऱ्या तलाकच्या स्वरूपांत) तर इद्दतच्या आंत रूजुअ करूंशकावे.

४) म्हणजे तलाक देतांच स्त्रीला आपल्या घराच्या बाहेर काढू नका. किंबहुना इद्दतपर्यंत तिला घरांतच राहू द्या आणि त्या वेळपर्यंत तिचे रहाणे आणि खाणे पिणे तुमची जबाबदारी आहे.

५) म्हणजे इद्दतीच्या काळांत स्वत: स्त्रीने सुद्धा घराच्या बाहेर निघण्याला आक्षेप घ्यावा. याशिवाय की, कोणी फारच आवश्यक मामला असेल.

६) म्हणजे निर्लज्जपणाचे काम करून बसेल किंवा वाईट साईट बोलेल व चारित्र्यहिनता जाहीर करेल, ज्याच्याने घरवाल्यांना त्रास होईल. दोन्ही स्वरूपांत तिला बाहेर काढणे योग्य होईल.

७) म्हणजे चर्चित आदेश, अल्लाहच्या बांधीव मर्यादा (हदे) आहेत. त्यांच्या पलीकडे जाणे, स्वत: आपल्यावरच जुलूम करणे आहे. कारण की, याचे धार्मिक आणि ऐहिक नुकसान मर्यादेपलीकडे जाणाऱ्यालाच भोगावे लागतील.

८) म्हणजे पतीच्या मनांत तलाक दिलेल्या स्त्रीची आवड निर्माण करून देईल, आणि तो रुजुअ करून घेण्याला तयार होईल. जसे की पहिल्या आणि दुसऱ्या तलाकनंतर पतीला इद्दतीच्या आंत, रुजुअ करून घेण्याचा हक्क प्राप्त आहे. म्हणूनच काही भाष्यकारांचे मत आहे की, या महावाक्यांत अल्लाहतआलाने फक्त एक तलाक देण्याची सूचना, केली आहे. आणि एकाच वेळी तीन तलाक देण्यापासून मना केले आहे. कारण की, जर तो एकाच वेळी तीन तलाक देऊन देईल, आणि शरिअत त्याला योग्य ठरवून लागूंपण करून देईल, तर मग हे म्हणणे फायदेकारक नाही की, कदाचित् अल्लाहतआला कोणी नवीन गोष्ट निर्माण करून देईल. (फत्हुल कदीर) याच्यानेच ईमाम अहमद आणि दुसऱ्या काही धर्मपंडितांनी हे प्रमाणपण धरले आहे की, राहणे आणि खाण्यापिण्याची जी ताकीद केली गेली आहे, ती त्या स्त्रियांसाठी आहे, ज्यांना त्यांच्या पतींनी पहिला किंवा दुसरा तलाक दिला असावा. कारण की याच्यांत पतीचा रुजुअ करून घेण्याचा हक्क कायम राहतो. आणि ज्या स्त्रीला वेगवेगळ्या वेळीं, दोन तलाक मिळून चुकले असतील, तर तिसरा तलाक तिच्यासाठी 'तलाके बत्ता' किंवा 'बाईन:' आहे. तिचे रहाणे आणि खानपान पतीवर नाही तिला लगेच पतीच्या घरून दुसऱ्या जागी पाठवून देण्यांत यावे. कारण की पती आता तिला रूजुअ करून आपल्या घरांत ठेवू शकत नाही. 'हत्ता तनकेह ज़ौजन गय्रहू' ''येथपर्यंत की ती दुसऱ्या कुण्या पतीशी निकाह करुन धेईल.'' (सू. बकर : २३०) (मग तो तलाक देऊन दे किंवा मृत्यु पावून जावे) म्हणून आता तिला पतीजवळ राहण्याचा आणि त्याच्याकडून खानपान (खावटी) वसूल करण्याचा हक्क नाही. याचे समर्थन ह.फातिमा बिन्ते कैसच्या या गोष्टीवरून होत आहे की, जेव्हा तिच्या पतीने तिला तिसरा तलाकपण देऊन दिला आणि याच्यानंतर तिला पतीच्या घरून निघून जाण्याचे सांगण्यांत आले, तर ती तयार झाली नाही. सरशेवटी मामला रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या जवळ पोहचला. तर आपण ﷺ नी हाच निर्णय दिला की, तिच्यासाठी रहाणे आणि खानपान (खावटी) नाही. तिला लगेच कोण्या दुसऱ्याजागी चालले जावयास पाहिजे. किंबहुना काही रिवायतींमध्ये खुलासापण आहे, पत्नीसाठी खाणेपिणे आणि राहणे तोपर्यंत आहे, जोपर्यंत पतीला रुजूअ करण्याचा हक्क आहे. (अहमद, निसाई) तथापि काही रिवायतींमध्ये, गर्भिणी स्त्री करीता सुद्धा खानपान आणि रहाण्याचे स्पष्टीकरण आहे. (तपशील आणि आणखी हवाल्यासाठी पहावे नैलुल अवतार)

९) तलाक दिलेल्या, समागम झालेल्या स्त्रीची इद्दत तीन विटाळ आहे. जर रुजुअ करून घेण्याचा उद्देश्य असेल, तर इद्दत संपण्यापूर्वी, रुजुअ करून घ्या. दुसऱ्या परिस्थितीत त्यांना चांगल्या रितीने आपल्याकडून वेगळे करून द्या.

१०) या रुजुअ करण्यावर आणि काहींजवळ तलाकवर साक्षीदार ठेवून घ्या. हा हुकूम वाजीब नाही, पण चांगल्याकरीता आहे. म्हणजे साक्षीदार करून घेणे चांगले आहे, तथापि आवश्यक नाही.

११) ही ताकीद साक्षीदारांना आहे की, त्यांनी कोणाची तरफदारी आणि लोभाशिवाय बरोबर साक्ष द्यावी.

१२) म्हणजे संकटातून आणि कसोटीतून बाहेर पडण्याचा मार्ग निर्माण करून देतो.

१३) म्हणजे तो जे इच्छील, त्याला कोणी अडविणारा नाही.

१४) अडचणीसाठी सुद्धा आणि सुलभतेसाठी सुद्धा हे दोन्ही आपल्या वेळेवर कळसाला पोहचून जातात. काहींनी याच्याने विटाळ आणि इद्दत अभिप्रेत धरली आहे.

وَالّٰٓـِٔيْ يَئِسْنَ مِنَ الْمَحِيْضِ مِنْ نِّسَآئِكُمْ
اِنِ ارْتَبْتُمْ فَعِدَّتُهُنَّ ثَلٰثَةُ اَشْهُرٍ ۙ وَّالّٰٓـِٔيْ لَمْ
يَحِضْنَ ۭ وَاُولَاتُ الْاَحْمَالِ اَجَلُهُنَّ اَنْ يَّضَعْنَ
حَمْلَهُنَّ ۭ وَمَنْ يَّتَّقِ اللّٰهَ يَجْعَلْ لَّهٗ مِنْ اَمْرِهٖ
يُسْرًا ④

तुमच्या स्त्रियांतून ज्या स्त्रिया विटाळापासून निराश होऊन गेल्या असतील, जर तुम्हास शंका असेल, तर त्यांची इद्दत तीन महिने आहे आणि त्याचीसुद्धा ज्यांना अजून विटाळ येणे सुरुच झाले नसेल [१] आणि गर्भिणी स्त्रियांची इद्दत, त्यांच्या मूल प्रसविण्यापर्यंत [२] आहे आणि जो मनुष्य अल्लाहतआलाला भित राहील अल्लाह त्याचे (प्रत्येक) काम सोपे करील ④

ذٰلِكَ اَمْرُ اللّٰهِ اَنْزَلَهٗٓ اِلَيْكُمْ ۭ وَمَنْ يَّتَّقِ
اللّٰهَ يُكَفِّرْ عَنْهُ سَيِّاٰتِهٖ وَيُعْظِمْ لَهٗٓ اَجْرًا ⑤

हा अल्लाहचा हुकूम आहे, जो अल्लाहने तुमच्याजवळ पाठविला आहे आणि जो मनुष्य अल्लाहला भित राहील, अल्लाह त्याचे अपराध क्षमा करून टाकील. आणि त्याला फार मोठे प्रतिफल देईल. ⑤

اَسْكِنُوْهُنَّ مِنْ حَيْثُ سَكَنْتُمْ مِّنْ وُّجْدِكُمْ
وَلَا تُضَآرُّوْهُنَّ لِتُضَيِّقُوْا عَلَيْهِنَّ ۭ وَاِنْ كُنَّ اُولَاتِ
حَمْلٍ فَاَنْفِقُوْا عَلَيْهِنَّ حَتّٰى يَضَعْنَ حَمْلَهُنَّ ۚ فَاِنْ
اَرْضَعْنَ لَكُمْ فَاٰتُوْهُنَّ اُجُوْرَهُنَّ ۚ وَاْتَمِرُوْا بَيْنَكُمْ
بِمَعْرُوْفٍ ۚ وَاِنْ تَعَاسَرْتُمْ فَسَتُرْضِعُ لَهٗٓ اُخْرٰى ⑥

तुम्ही आपल्या सामर्थ्यानुसार, जेथे तुम्ही रहात आहात, तेथे या (तलाक दिलेल्या) स्त्रियांना ठेवा. [३] आणि त्यांना तंग करण्यासाठी त्यांना त्रास देऊ नका [४] आणि जर त्या गर्भवती असतील तर मूल प्रसविण्यापर्यंत त्यांना खर्च देत रहा. [५] मग जर तुमच्या म्हणण्यावरून त्याच दूध पाजतील तर तुम्ही त्यांना त्याचा मोबदला देऊन टाका. [६] आणि आपसांत योग्य पद्धतीने सल्ला मसलत करून घेत जा; [७] आणि जर तुम्ही आपसांत ओढाताण कराल, तर त्याच्या सांगण्याने आणखी कोणी (मुलाला) दूध पाजील. [८] ⑥

لِيُنْفِقْ ذُوْ سَعَةٍ مِّنْ سَعَتِهٖ ۭ وَمَنْ قُدِرَ عَلَيْهِ
رِزْقُهٗ فَلْيُنْفِقْ مِمَّآ اٰتٰىهُ اللّٰهُ ۭ لَا يُكَلِّفُ اللّٰهُ نَفْسًا
اِلَّا مَآ اٰتٰىهَا ۭ سَيَجْعَلُ اللّٰهُ بَعْدَ عُسْرٍ يُّسْرًا ⑦ ع ١ ٧ ١٧

ऐपतवाल्याला आपल्या ऐपतीप्रमाणे खर्च करावयास पाहिजे [९] आणि ज्यावर अन्नसंपत्तीची तंगी केली गेली असेल, [१०] त्याला पाहिजे की, जे काही अल्लाहने त्याला देऊन ठेवले आहे, याच्यातूनच (आपल्या ऐपतीप्रमाणे) द्यावे कोण्या मनुष्याला अल्लाह तकलीफ देत नाही, परंतु तेवढेच जेवढे सामर्थ्य त्याला देऊन ठेवले आहे. [११] अल्लाह तंगीच्या
१ ع ७ १७ नंतर सुबत्तापण करून देईल. [१२] ⑦

وَكَاَيِّنْ مِّنْ قَرْيَةٍ عَتَتْ عَنْ اَمْرِ رَبِّهَا
وَرُسُلِهٖ فَحَاسَبْنٰهَا حِسَابًا شَدِيْدًا ۙ وَّعَذَّبْنٰهَا
عَذَابًا نُّكْرًا ⑧

आणि पुष्कळशा वस्तीवाल्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या हुकुमाकडून आणि त्याच्या पैगंबराच्या (आज्ञे) कडून तोंड फिरविले, [१३] तेव्हा आम्ही सुद्धा त्यांच्याकडून कडक हिशेब घेतला. आणि न पाहिलेली शिक्षा त्यांच्यावर टाकून दिली. [१४] ⑧

فَذَاقَتْ وَبَالَ اَمْرِهَا وَكَانَ عَاقِبَةُ اَمْرِهَا
خُسْرًا ⑨

तर त्यांनी आपल्या कर्तृत्वाची गोडी चाखली आणि परिणामी त्यांचा तोटाच झाला. ⑨

اَعَدَّ اللّٰهُ لَهُمْ عَذَابًا شَدِيْدًا ۙ فَاتَّقُوا
اللّٰهَ يٰٓاُولِي الْاَلْبَابِ ۚ الَّذِيْنَ اٰمَنُوْا ۚ قَدْ
اَنْزَلَ اللّٰهُ اِلَيْكُمْ ذِكْرًا ⑩

यांच्याकरीता अल्लाहने कडक शिक्षा तयार करून ठेवली आहे. तर अल्लाहला भ्या! हे बुद्धीमान ईमानवाल्यांनो! खचित्‌च अल्लाहने तुमच्याकडे बोध पाठविला आहे. ⑩

१) ही त्यांची इद्दत आहे, ज्यांचा विटाळ वय झाल्यामुळे बंद होऊन गेला किंवा ज्यांना विटाळ येणे सुरूच झाले नाही. लक्षांत ठेवावे की, कधी कधी असे होते की, स्त्री मोठी होऊन पतीबरोबर राहू लागते, आणि तिला विटाळ येत नाही.

२) तलाक दिलेली स्त्री जर गर्भवती असेल तर तिची इद्दत गर्भ बाहेर टाकून देण्यापर्यंत आहे. मग जरी दुसऱ्याच दिवशी गर्भपात होऊन जाईल. याशिवाय उघड महावाक्याने हेच ठाऊक होते की, प्रत्येक गर्भवती स्त्रीची इद्दत आहे. मग जरी ती तलाक दिलेली असो किंवा तिचा पती मरण पावलेला असो. हदीसींनी सुद्धा याचे समर्थन होते. (पहावे स.बुखारी, स. मुस्लिम) दुसऱ्या स्त्रिया ज्यांचे पती मरण पावले आहेत, त्यांची इद्दत ४ महिने १० दिवस आहे. (सू.बकर: आ२३४)

३) म्हणजे तलाक दिलेल्या आणि रुजुअ करून घेण्याची शक्यता असलेलिला. यासाठी की बाईन: तलाक दिलेल्या करीता रहाणे आणि खानपानाची आवश्यकता नाही. जसे की मागील पानांत येऊन चुकले. आपल्या सामर्थ्यानुसार ठेवण्याचा अर्थ आहे की, जर घर विस्तृत असेल, आणि त्याच्यांत अनेक खोल्या असतील, तर एक खोली तिच्याकरीता खास करून दिली जावी. नाही तर आपली स्वत:ची खोली, तिच्यासाठी खाली करून दिली जावी. याच्यांत प्रयोजन हेच आहे की, जवळ राहून इद्दत घालवील, तर कदाचित् पतीचे मन वळून जाईल आणि रुजुअ करण्याची चाहत, त्याच्या मनांत निर्माण होऊन जाईल. विशेष करून जर मुले पण असतील तर चाहत आणि रुजुअ करून घेण्याची मजबुत शक्यता आहे. परंतु खेद आहे की मुसलमान या सूचनेवर अंमलबजावणी करीत नाही. ज्यामुळे ह्या हुकूमाचा फायदा आणि प्रयोजनापासून सुद्धा ते वंचित् आहे. आमच्या समाजांत तलाकच्या बरोबरच ज्याप्रमाणे स्त्रीला अस्पृश्य बनवून, घरांतून काढून दिले जाते, किंवा काही वेळा मुलीवाले तिला आपल्या घरी घेऊन जातात; हा रिवाज कुरआन करीमच्या स्पष्ट शिकवणीच्या एकदम विरुद्ध आहे.

४) म्हणजे खानपानामध्ये किंवा रहाण्याच्या जागेत, तिला तंग आणि बेईज्जत करणे कारण की, तिला घर सोडणे भाग पडावे. इद्दतच्या काळांत अशी वागणूक न अंगीकारली जावी. काहींनी याचा अर्थ हा सांगितला आहे की इद्दत संपण्याच्या जवळ असेल तर मग रुजुअ करून घेतले जावे; आणि वारंवार असे करावे, जसे की अज्ञान काळांत असे केले जात असे. ज्याच्या बंद करण्याला शरिअतने तलाकनंतर रुजु करण्याला मर्यादा (हद) निश्चित करून दिली. कारण की कोणी मनुष्य पुढील काळांत स्त्रीला त्रास देऊ नये. आता एक मनुष्य दोन वेळा असे करूंशकतो, म्हणजे तलाक देऊन, इद्दत संपण्यापूर्वी रुजुअ करून घेणे. परंतु तिसऱ्या वेळी जेव्हा तलाक देईल, तर त्याच्यानंतर रुजुअ करण्याचा हक्कपण संपून जाईल.

५) म्हणजे तलाक दिलेली स्त्री मग ती 'बाईन:' कांअसेना, जर ती गर्भवती असेल तर तिचे खानपान आणि राहण्याची जागा आवश्यक आहे. जसे की पूर्वीपण सांगितले गेले आहे.

६) म्हणजे तलाक दिल्यानंतर जर ती तुमच्या मुलाला दूध पाजील, तर तिचे वेतन तुमच्यावर आहे.

७) म्हणजे आपसातील सल्ला मसलतीने वेतन आणि दुसरे मामले नक्की केले जावे. उदाहरणार्थ मुलाच्या बापाने रितीप्रमाणे मोबदला द्यावा आणि आईने बापाच्या कुवतीनुसार मोबदला मागावा. वगैरे.

८) म्हणजे आपसांत मोबदला वगैरेचा मामला निश्चित होऊ शकत नसेल तर कोण्या दुसऱ्या स्त्री बरोबर मामला करून घ्यावा, जी त्याच्या मुलाला दूध पाजील.

९) म्हणजे दूध पाजणाऱ्या स्त्रियांना मोबदला आपल्या कुवतीनुसार दिला जावा. जर अल्लाहने धन दौलतीत भरपूर दिले असेल तर अशाच विपुलतेने दूध पाजणारीची सेवा आवश्यक आहे.

१०) म्हणजे आर्थिक दृष्टीने तो दुर्बल असेल.

११) म्हणून तो गरीब आणि दुर्बलाला हा हुकूम देत नाही की, त्याने दूध पाजणाऱ्या स्त्रीला जास्त मोबदला द्यावा. अर्थ हा सूचनांचा हा आहे की, मुलाची आई आणि मुलाचा बाप, दोघांनी अशी योग्य वागणूक ठेवावी की, एक दुसऱ्याला त्रास न व्हावा आणि मुलाला दूध पाजण्याची समस्या गंभीर बनू नये. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''न आईला मुलामुळे त्रास दिला जावा, आणि न बापाला.'' (सू. अल् बकर:२३३)

१२) म्हणून जे अल्लाहवर भरवंसा करतात अल्लाहतआला त्यांना सुलभता आणि सुबत्तापण बहाल करतो.

१३) अतत म्हणजे अल्लाहच्या हुकूम आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालनापासून इनकार केला.

१४) नुकरन्, हिशेब आणि शिक्षा दोहोंनी अभिप्रेत, ऐहिक पकड आणि शिक्षा आहे अजाबन् नुकरा, ती शिक्षांआहे जी जगांत दुष्काळ, धरती खचून जाणे, चेहरे विद्रुप होऊन जाणे, वगैरेच्या स्वरूपांत त्यांना दिली गेली आणि हिसाबन् शदीदा, तो आहे जो परलोकांत होईल. (फत्हूल कदीर)

رَّسُوۡلًا يَّتۡلُوۡا عَلَيۡكُمۡ اٰيٰتِ اللّٰهِ مُبَيِّنٰتٍ
لِّيُخۡرِجَ الَّذِيۡنَ اٰمَنُوۡا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ
مِنَ الظُّلُمٰتِ اِلَى النُّوۡرِ ؕ وَمَنۡ يُّؤۡمِنۡۢ
بِاللّٰهِ وَ يَعۡمَلۡ صَالِحًا يُّدۡخِلۡهُ جَنّٰتٍ
تَجۡرِىۡ مِنۡ تَحۡتِهَا الۡاَنۡهٰرُ خٰلِدِيۡنَ فِيۡهَاۤ
اَبَدًا ؕ قَدۡ اَحۡسَنَ اللّٰهُ لَهٗ رِزۡقًا ﴿۱۱﴾

(म्हणजे) पैगंबर जो [१] तुम्हांस अल्लाहचे स्पष्ट स्पष्ट आदेश, वाचून ऐकवितो; कारण की त्या लोकांना जे ईमान आणतील आणि चांगली कामे करतील, त्यांना अंध:कारातून काढून प्रकाशाकडे घेऊन [२] यावे आणि जो मनुष्य अल्लाहवर ईमान आणेल आणि चांगली कामे करील. [३] अल्लाह त्याला अशा स्वर्गांत दाखल करील, ज्याच्या खाली पाण्याचे पाट वहात आहेत. ज्यांत हे नित्य निरंतर राहतील. नि:संशय अल्लाहने त्याला उत्कृष्ट अन्नसंपत्ती देऊन ठेवली आहे. (११)

اَللّٰهُ الَّذِىۡ خَلَقَ سَبۡعَ سَمٰوٰتٍ وَّ مِنَ
الۡاَرۡضِ مِثۡلَهُنَّ ؕ يَتَنَزَّلُ الۡاَمۡرُ بَيۡنَهُنَّ
لِتَعۡلَمُوۡۤا اَنَّ اللّٰهَ عَلٰى كُلِّ شَىۡءٍ قَدِيۡرٌ ۙ
وَّ اَنَّ اللّٰهَ قَدۡ اَحَاطَ بِكُلِّ شَىۡءٍ عِلۡمًا ﴿۱۲﴾ ع ٢ ٥ ١٨

अल्लाह तो आहे ज्याने सात आकाशे बनविली आणि त्याच्याच सारखी पृथ्वी सुद्धा. [४] त्यांचा हुकूम त्यांच्या दर्म्यान उतरत असतो की, [५] तुम्हांस माहित व्हावे की, अल्लाह सर्व सामर्थ्यवान आहे; आणि अल्लाहतआलाने प्रत्येक वस्तूला ज्ञानाच्या अनुषंगाने घेरून ठेवले आहे. [६] (१२)

اٰياتُها ١٢ | (٦٦) سُوۡرَةُ التَّحۡرِيۡمِ مَدَنِيَّةٌ (١٠٧) | رُكُوعَاتُها ٢

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

महावाक्ये १२ | (६६) सू. अत्तहरीम | रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يٰۤاَيُّهَا النَّبِىُّ لِمَ تُحَرِّمُ مَاۤ اَحَلَّ اللّٰهُ لَكَ ۚ
تَبۡتَغِىۡ مَرۡضَاتَ اَزۡوَاجِكَ ؕ وَ اللّٰهُ غَفُوۡرٌ
رَّحِيۡمٌ ﴿۱﴾

अहो पैगंबरा! ज्या वस्तूला अल्लाहने आपल्या करीता हलाल करून दिले आहे. तिला आपण का हराम ठरवीत आहात? [७] (काय) आपण आपल्या पत्नीची सुप्रसन्नता प्राप्त करू इच्छिता? आणि अल्लाह क्षमाकर्ता आणि दयाळूंआहे. (१)

قَدۡ فَرَضَ اللّٰهُ لَكُمۡ تَحِلَّةَ اَيۡمَانِكُمۡ ۚ وَ اللّٰهُ
مَوۡلٰٮكُمۡ ۚ وَهُوَ الۡعَلِيۡمُ الۡحَكِيۡمُ ﴿۲﴾

खचित्च अल्लाहतआलाने तुमच्या शपथा मोडण्याचाही नियम ठरविला आहे. [८] आणि अल्लाहतआला तुमचा पुरस्कर्ता आहे. आणि तोच (सर्व) ज्ञानी आणि बुद्धीमान आहे. (२)

وَاِذۡ اَسَرَّ النَّبِىُّ اِلٰى بَعۡضِ اَزۡوَاجِهٖ حَدِيۡثًا ۚ
فَلَمَّا نَبَّاَتۡ بِهٖ وَ اَظۡهَرَهُ اللّٰهُ عَلَيۡهِ عَرَّفَ
بَعۡضَهٗ وَ اَعۡرَضَ عَنۡۢ بَعۡضٍ ۚ فَلَمَّا نَبَّاَهَا بِهٖ
قَالَتۡ مَنۡ اَنۡۢبَاَكَ هٰذَا ؕ قَالَ نَبَّاَنِىَ الۡعَلِيۡمُ
الۡخَبِيۡرُ ﴿۳﴾

आणि जेव्हा पैगंबराने, आपल्या पत्न्यांपैकी कोण्या एका पत्नीला, एक गुप्त गोष्ट सांगितली. [९] मग जेव्हा तिने या गोष्टीला जाहीर करून टाकले; [१०] आणि अल्लाहने आपल्या पैगंबराला यावर सूचित केले तर नबी (सल्ल.) नी थोडीशी गोष्ट तर सांगून दिली, आणि थोडीशी टाळून दिली; [११] मग जेव्हा पैगंबरानी आपल्या त्या पत्नीला ती गोष्ट सांगून दिली तेव्हा ती म्हणू लागली, याची बातमी आपणांस कोणी दिली? [१२] म्हणाले सर्व काही जाणणाऱ्या पूर्ण खबर बाळगणाऱ्या अल्लाहने मला सर्व काही सांगून दिले. [१३] (३)

१) म्हणजे जिक्र (कुरआना) ला अवतरीत केले आणि पैगंबराला पाठविले.

२) हे पैगंबरांचे पद आणि त्यांची कर्तव्ये सांगण्यांत येत आहे की, तो कुरआनामार्फत लोकांना चारित्र्य हिनता आणि शिर्क व अज्ञानाच्या अंध:कारातून काढून, ईमान आणि सुकृत्याच्या प्रकाशाकडे आणतो. पैगंबराने येथे अभिप्रेत येथे अर्रसूल म्हणजे हजरत मुहम्मद रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत.

३) सुकृत्यांत दोन्ही गोष्टी शामील आहेत. आदेश आणि कर्तव्याची पूर्तता आणि गुन्हे आणि मना केलेल्या गोष्टींपासून वाचणे अर्थ आहे की, स्वर्गामध्ये तेच ईमानवाले दाखल होतील, ज्यांनी फक्त तोंडानेच ईमान जाहीर केले नव्हते; किंबहुना त्यांनी ईमानाच्या तगाद्यांप्रमाणे कर्तव्यांवर अंमलबजावणी आणि गुन्ह्यांपासून (स्वत:ला) वांचविले होते.

४) म्हणजे सात आकाशांप्रमाणे अल्लाहतआलाने सात जमिनीपण (पृथ्वी) निर्माण केल्या आहेत. काहींनी याच्याने सात राष्ट्र किंवा राज्ये, अभिप्रेत धरले आहेत. परंतु हे बरोबर नाही. किंबहुना वर खाली सात आकाशे आहेत. अशा प्रकारे सात जमिनीपण आहेत. ज्यांच्या दर्म्यान अंतर आहे आणि प्रत्येक जमिनीमध्ये अल्लाहची सृष्टी वसलेली आहे. (अल् कुर्तुबी) हदीसींनी सुद्धा याचे समर्थन होते. जसे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''ज्याने कोणी कोणाची एक बिल्लास जमीन सुद्धा हडप करून घेतली, तर कयामतच्या दिवशी एवढा भाग, सातही जमिनींचा

मान खोडा बनवून त्याच्या गळ्यांत टाकून देण्यांत येईल.'' (स.मुस्लिम) बुखारीचे शब्द आहेत, ''त्याला सात जमिनीपर्यंत धसवून टाकण्यांत येईल.'' (स.बुखारी)

५) म्हणजे ज्याप्रमाणे प्रत्येक आकाशावर अल्लाहचा हुकूम लागू आणि प्रस्थापित आहे, अशाच प्रकारे प्रत्येक जमिनीवर त्याचा हुकूम चालतो. आकाशांप्रमाणे साती जमिनीत सुद्धा तो व्यवस्था करतो.

६) तर कोणतीही वस्तूंत्याच्या ज्ञानापलीकडे नाही; मग ती कशी कांअसेना!

७) नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी ज्या वस्तूला आपल्यासाठी हराम करून घेतले होते, ती काय होती? ज्यावर अल्लाहतआलाने आपली नाराजी दाखविली होती. या संदर्भात एक तर ती प्रसिद्ध घटना आहे जी सहीह बुखारी व स. मुस्लिम वगैरे मध्ये नोंदलेली आहे की, आपण ﷺ ह. जैनब बिन्ते जहश ؓ च्या जवळ काही वेळ थांबत आणि तेथे मध पित. ह.हफसा आणि ह.आयेशा ؓ उभयतांनी तेथे नेहमीपेक्षा जास्त वेळ आपण न थांबण्यासाठी मना करण्यासाठी, ही योजना तयार केली की, यांच्यातून ज्यांच्याजवळ पण रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम येतील तर त्यांनी त्यांना असे म्हणावे की अहो पैगंबरा! आपल्या तोंडातून मगाफिर (एका प्रकारचे फूल ज्यातून एक प्रकारचा दुर्गंध येतो) चा वास येत आहे. म्हणून त्यांनी असेच केले. आपण ﷺ नी फर्माविले मी तर जैनब च्या घरी फक्त मध प्यालो आहे. आता मी शपथ वहातो की, हे मी पिणार नाही. परंतु तुम्ही ही गोष्ट कोणाला सांगू नका. (स.बुखारी तफसीर, सू.अत्तहरिम) दुसरी गोष्ट अशी आहे की, सुनन निसाईमध्ये सांगण्यांत आले आहे की, ती एक दासी होती, जिला आपण ﷺ नी आपल्या वर हराम करून घेतले होते. शेख अल्बानीने याला बरोबर ठरविले आहे. निसाई (८३/३) याचा तपशीला दुसऱ्या पुस्तकामध्ये अशा प्रकारे आला आहे की, ही ती हजरत मारीया किब्तीया ؓ होती. ज्यांच्यापासून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे पुत्र इब्राहीम जन्मले होते. या एकदा ह.हफ्साच्या घरी आल्या होत्या जेव्हा की, ह.हफ्सा उपस्थित नव्हत्या, योगायोगाने त्यांच्याच उपस्थितीत ह.हफ्सा येऊन लागल्यात. त्यांना नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला आपल्या घरांत त्यांच्याबरोबर एकांतात पहाणे बरे वाटले नाही. ज्याची जाणीव नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला पण झाली. ज्यावर आपण ﷺ नी ह. हफ्साला खूष करण्यासाठी शपथ वाहून मारियाला आपल्यावर हराम करून घेतले आणि हफ्साला ताकीद केली की, त्यांनी ही गोष्ट कोणाला सांगू नये. ईमाम इब्ने हज्र एक तर असे म्हणतात की, ही गोष्ट वेगवेगळ्या प्रकारे सांगण्यांत आली आहे. जे एक दुसऱ्याचे समर्थन करतात. दुसरी गोष्ट ते ही सांगतात शक्य आहे की एकाच वेळी, दोन्ही गोष्टी या महावाक्याच्या अवतरणाला कारणीभूत झाल्या असाव्यांत. (फत्हूल बारी तफसीर सू.त्तहरीम) ईमाम शौकानीने सुद्धा याच मताला जाहीर केले आहे. आणि दोन्ही गोष्टींना बरोबर ठरविले आहे. याने ही गोष्ट स्पष्ट झाली की, अल्लाहच्या हलाल केलेल्या वस्तूला हराम करण्याचा अधिकार कोणाजवळ पण नाही. येथपावेतो की रसूलुल्लाह ﷺ सुद्धा हा अधिकार बाळगत नाहीत.

८) म्हणजे प्रायश्चित घेऊन त्या कामाला करण्याची, ज्याला न करण्यासाठी, शपथ घेतली असेल, परवानगी देऊन दिली. शपथेचे प्रायश्चित सू.माईदः ८९ मध्ये सांगण्यात आले आहे. म्हणून नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी सुद्धा, प्रायश्चित घेऊन, मधाचा पण उपयोग केला, आणि मारिआचा हक्क पण अदा केला. (फत्हूल कदीर) या हुकूमात धर्मपंडितांच्या दर्म्यान मतभेद आहे की, जर कोणी मनुष्य कोण्या वस्तूला आपल्यावर हराम करून घेईल, तर याचा काय हुकूम आहे? बहुतेक धर्मपंडितांजवळ, पत्नी सोडून कोण्या वस्तूला हराम करून घेण्याने, ती वस्तू हराम होणार नाही. तसेच त्यावर प्रायश्चित्त असणार नाही. जर पत्नीला आपल्यावर हराम करून घेईल, तर याच्याने त्याला तिला तलाक देण्याचा उद्देश्य असेल, तर तलाक होऊन जाईल. आणि जर तलाकची नियत नसेल तर उपरोक्त म्हणण्यानुसार ही शपथ आहे. याच्याकरीता केलेले प्रायश्चित्त घेणे आवश्यक आहे. (अयसरुत तफासीर)

९) ती गूप्त गोष्ट मध किंवा मारिअः ؓ ला हराम करून घेण्याची गोष्ट होती, जी आपण ﷺ नी हफ्सा ؓ जवळ केली होती.

१०) म्हणजे ह.हफ्सा ؓ नी जाऊन ही गोष्ट ह.आयेशा ؓ, ला सांगून दिली.

११) म्हणजे ह.हफ्सा ؓ ला हे सांगून दिले की, तुम्ही माझा गुप्तभेद जाहीर करून दिला आहे. तथापि आपला आदर आणि महत्तेला समोर ठेवून सर्व गोष्ट सांगण्याचे टाळून दिले.

१२) जेव्हा नबी ﷺ नी हफ्सा ؓ ला सांगितले की, तुम्ही माझा गुप्तभेद जाहीर करून टाकला आहे. तर ती आश्चर्य चकीत झाली कारण की, त्यांनी ह.आयेशा ؓ शिवाय, कोणाला ही गोष्ट सांगितली नव्हती; आणि ह.आयेशा ؓ कडून त्यांना ही आशा नव्हती की, त्या ही गोष्ट आपण ؓ ला सांगून टाकतील; कारण की त्या या मामल्यांत भागीदार होत्या.

१३) याच्याने ठाऊक झाले की, कुरआनाशिवाय सुद्धाआपणावर वह्यचे अवतरण होत असेल.

اِنْ تَتُوْبَآ اِلَى اللّٰهِ فَقَدْ صَغَتْ قُلُوْبُكُمَا ج
وَاِنْ تَظٰهَرَا عَلَيْهِ فَاِنَّ اللّٰهَ هُوَ مَوْلٰىهُ وَجِبْرِيْلُ
وَصَالِحُ الْمُؤْمِنِيْنَ ج وَالْمَلٰٓئِكَةُ بَعْدَ ذٰلِكَ
ظَهِيْرٌ ﴿٤﴾

**(अहो पैगंबरांच्या उभय पत्नींनो!) जर तुम्ही अल्लाहच्या समोर तौबा करून घ्याल, (तर हे फार उत्तम आहे[१]) खचितच तुमची अंत:करणे ढळून गेली आहेत.[२] आणि जर तुम्ही पैगंबराच्या विरूद्ध एक दुसऱ्याची मदत कराल, तर खचित्च त्याचा हिमायती आणि मददगार अल्लाह आहे आणि जिब्रईल आणि पुण्यशील ईमानवाले, आणि यांच्याशिवाय दुसरे देवदूतसुद्धा मदत करणारे आहेत.[३] ४**

عَسٰى رَبُّهٗٓ اِنْ طَلَّقَكُنَّ اَنْ يُّبْدِلَهٗٓ اَزْوَاجًا
خَيْرًا مِّنْكُنَّ مُسْلِمٰتٍ مُّؤْمِنٰتٍ قٰنِتٰتٍ تٰٓئِبٰتٍ
عٰبِدٰتٍ سٰٓئِحٰتٍ ثَيِّبٰتٍ وَّاَبْكَارًا ﴿٥﴾

**जर तो (पैगंबर) तुम्हास तलाक देऊन टाकेल, तर फारच लवकर त्यांना त्यांचा पालनकर्ता तुमच्या ऐवजी तुमच्यापेक्षा उत्तम पत्न्या बहाल करील.[४] ज्या इस्लामवाल्या, ईमानवाल्या, अल्लाहच्या समक्ष झुकणाऱ्या तौबा करणाऱ्या, उपासना करणाऱ्या, उपवास ठेवणाऱ्या असतील त्या विधवा किंवा कुंवाऱ्या असतील[५] ५**

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا قُوْٓا اَنْفُسَكُمْ وَاَهْلِيْكُمْ
نَارًا وَّقُوْدُهَا النَّاسُ وَالْحِجَارَةُ عَلَيْهَا مَلٰٓئِكَةٌ
غِلَاظٌ شِدَادٌ لَّا يَعْصُوْنَ اللّٰهَ مَآ اَمَرَهُمْ
وَيَفْعَلُوْنَ مَا يُؤْمَرُوْنَ ﴿٦﴾

**अहो ईमानवाल्यांनो! तुम्ही आपल्या स्वत:ला आणि आपल्या घरवाल्यांना त्या आगीपासून वांचवा,[६] जिचे इंधन मनुष्य आणि दगड (आहेत) जिच्यावर जबरदस्त आणि कडक स्वभावाचे देवदूत नेमलेले आहेत; त्यांना जो हुकूम अल्लाहतआला देतो, त्याचा ते आज्ञाभंग करीत नाहीत. किंबहुना जी आज्ञा दिली जाईल, ती ते (अक्षरश:) बजावितात. ६**

يٰٓاَيُّهَا الَّذِيْنَ كَفَرُوْا لَا تَعْتَذِرُوا الْيَوْمَ ط اِنَّمَا
تُجْزَوْنَ مَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ﴿٧﴾ ع ١٩ ٧ ١

१ ع ७ १९ **अहो काफिरांनो! आज तुम्ही सबबी पुढे करू नका. तुम्हास फक्त**
**तुमच्या कर्तृत्वाचा बदला दिला जात आहे. ७**

१) किंवा तुमचा पश्चात्ताप मान्य केला जाईल

२) म्हणजे सत्त्यापासून दूर गेले आहेत; आणि ते आहे त्यांचे अशा वस्तुंला पसंत करणे जी नबी ﷺ ला पसंत नव्हती. (फत्हूल कदीर).

३) म्हणजे पैगंबरांच्या मुकाबल्यात तुम्ही गटबाजी कराल, तर पैगंबरांचे काहीही वाईट करू शकणार नाही. यासाठी की, पैगंबरांचा मददगार तर अल्लाह सुद्धा आहे आणि ईमानवाले आणि देवदूतसुद्धा, आहेत.

४) हे तंबी म्हणून पवित्र पत्न्यांना सांगण्यांत येत आहे की, अल्लाहतआला आपल्या पैगंबरांना, तुमच्यापेक्षा उत्तम पत्न्या देऊ शकतो.

५) 'सय्यिबात' 'सय्यीब' चे अनेकवचन आहे. (परत फिरून येणारी) विधवा स्त्रीला 'सय्यिब' यासाठी म्हणतात की, ती पतीपासून परत येते आणि मग अशाप्रकारे पतीविना राहून जाते, जशी पूर्वी होती. 'अब्कार' 'बिकर' चे अनेकवचन आहे. कुवारी स्त्री तिला 'बिकर' यासाठी म्हणतात की, ही अजून आपल्या पहिल्या अवस्थेत असते, ज्यावर तिची निर्मिती झालेली आहे. (फत्हूल कदीर)

६) याच्यात ईमानवाल्यांना एका अत्यंत महत्त्वाच्या जबाबदारीकडे लक्ष वेधण्यांत येत आहे. आणि ती आहे, आपल्या बरोबर आपल्या घरांतील लोकांना सुद्धा इस्लामी शिक्षणाची व्यवस्था करणे कारण की, या सर्वांनी नरकाग्नीचे इंधन होण्यापासून वांचून जाणे. म्हणूनच रसूलुल्लाह ﷺ नी सांगितले आहे की, जेव्हा मुलगा सात वर्षाचा होऊन जाईल, तेव्हा त्याला नमाज पढण्याची ताकीद करावी आणि दहा वर्षाच्या मुलाला जर नमाजीत हयगय करताना पहाल तर याला मारा. (अबुदाऊद, तिर्मिझी, किताबुस् सलात्त) फुकहा ने सांगितले अशाच प्रकारे उपवास पण ठेववून घ्यावेत; आणि दुसऱ्या (धार्मिक) आदेशांचे आज्ञापालन करण्याची ताकीद केली जावी. कारण की, जेव्हा ते समज येण्याच्या वयाला पोहचतील. तेव्हा त्यांना या सत्त्य धर्माची समज प्राप्त होऊन गेलेली असावी. (इब्ने कसीर)

يٰۤاَيُّهَا الَّذِيْنَ اٰمَنُوْا تُوْبُوْۤا اِلَى اللّٰهِ تَوْبَةً
نَّصُوْحًا ؕ عَسٰى رَبُّكُمْ اَنْ يُّكَفِّرَ عَنْكُمْ
سَيِّاٰتِكُمْ وَ يُدْخِلَكُمْ جَنّٰتٍ تَجْرِيْ مِنْ
تَحْتِهَا الْاَنْهٰرُ ۙ يَوْمَ لَا يُخْزِي اللّٰهُ النَّبِيَّ
وَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا مَعَهٗ ۚ نُوْرُهُمْ يَسْعٰى بَيْنَ
اَيْدِيْهِمْ وَ بِاَيْمَانِهِمْ يَقُوْلُوْنَ رَبَّنَاۤ اَتْمِمْ لَنَا
نُوْرَنَا وَ اغْفِرْ لَنَا ۚ اِنَّكَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرٌ ﴿٨﴾

**अहो ईमावानल्यांनो! तुम्ही अल्लाहच्या समक्ष निर्मल मनाने पश्चात्ताप व्यक्त करा. (१) जवळच आहे की, तुमचा पालनकर्ता तुमची पापे, तुमच्यापासून दूर करून टाकेल, आणि तुम्हास अशा स्वर्गांत पोहचवून देईल, ज्यांच्याखाली पाण्याचे पाट वहात आहेत; ज्या दिवशी अल्लाहतआला पैगंबर आणि ईमानवाल्यांना, जे त्याच्या बरोबर आहे, फजीत करणार नाही. त्यांचा प्रकाश त्यांच्या पुढे आणि त्यांच्या उजव्या बाजुला धांवत असेल. हे प्रार्थना करीत असतील हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या प्रकाशास आमच्याकरीता कायम ठेव. (२) आणि आम्हांस क्षमा कर नि:संशय तूच सर्वसामर्थ्यवान आहेस. ८**

يٰۤاَيُّهَا النَّبِيُّ جَاهِدِ الْكُفَّارَ وَ الْمُنٰفِقِيْنَ
وَ اغْلُظْ عَلَيْهِمْ ؕ وَ مَاْوٰىهُمْ جَهَنَّمُ ؕ وَ بِئْسَ
الْمَصِيْرُ ﴿٩﴾

**अहो पैगंबर! काफिरांशी आणि दांभिकांशी जिहाद करा.(३) आणि त्यांच्या वर सक्ती करा.(४) त्यांचे ठिकाण नरकाग्नी आहे;(५) जी फारच वाईट जागा आहे ९**

ضَرَبَ اللّٰهُ مَثَلًا لِّلَّذِيْنَ كَفَرُوا امْرَاَتَ نُوْحٍ وَّ امْرَاَتَ
لُوْطٍ ؕ كَانَتَا تَحْتَ عَبْدَيْنِ مِنْ عِبَادِنَا صَالِحَيْنِ
فَخَانَتٰهُمَا فَلَمْ يُغْنِيَا عَنْهُمَا مِنَ اللّٰهِ شَيْـًٔا
وَّ قِيْلَ ادْخُلَا النَّارَ مَعَ الدّٰخِلِيْنَ ﴿١٠﴾

**अल्लाहतआलाने काफिरांकरता नूहची आणि लूतची पत्नी यांचे उदाहरण दिले आहे. (६) या दोघी आमच्या सेवकांमधून, दोन पवित्राचरणी सेवकांच्या घरांत होत्या. मग त्यांनी त्यांना दगा दिला.(७) ते दोघे सदाचरणी सेवक, त्यांच्यापासून अल्लाहच्या शिक्षेला अडवूंशकले नाहीत. (८) आणि हुकूम देण्यांत आला की, (हे स्त्रियांनो!) नरकाग्नीत जाणाऱ्यांबरोबर तुम्ही उभयंता सुद्धा चालल्या जा. (९) १०**

وَ ضَرَبَ اللّٰهُ مَثَلًا لِّلَّذِيْنَ اٰمَنُوا امْرَاَتَ فِرْعَوْنَ ۘ
اِذْ قَالَتْ رَبِّ ابْنِ لِيْ عِنْدَكَ بَيْتًا فِي الْجَنَّةِ
وَ نَجِّنِيْ مِنْ فِرْعَوْنَ وَ عَمَلِهٖ وَ نَجِّنِيْ مِنَ
الْقَوْمِ الظّٰلِمِيْنَ ﴿١١﴾

**आणि अल्लाहतआलाने ईमानवाल्यांकरीता फिरऔनाच्या पत्नीचे उदाहरण सांगितले. (१०) जेव्हांकी, तिने प्रार्थना केली हे माझ्या पालनकर्त्या! माझ्याकरतांआपल्या जवळ स्वर्गांत एक घर बनीव. आणि मला फिरऔनापासून आणि त्याच्या कर्मांपासून वांचव. आणि मला (या) जालीम लोकांपासून सुटका दे. ११**

وَ مَرْيَمَ ابْنَتَ عِمْرٰنَ الَّتِيْۤ اَحْصَنَتْ فَرْجَهَا
فَنَفَخْنَا فِيْهِ مِنْ رُّوْحِنَا وَ صَدَّقَتْ بِكَلِمٰتِ
رَبِّهَا وَ كُتُبِهٖ وَ كَانَتْ مِنَ الْقٰنِتِيْنَ ﴿١٢﴾

**आणि (दृष्टांत दिला) 'इमरान' ची मुलगी 'मर्यम' (११) जिने आपली लाज सांभाळली. मग आम्ही आपल्याकडून तिच्यांत प्राण फूंकून दिला. आणि त्या ने (मर्यम) आपल्या पालनकर्त्याच्या गोष्टी आणि (१२) तिच्या पुस्तकांना खरे ठरवले. आणि उपासना करणाऱ्यांमधून होती. (१३) १२**

१) निखालस पश्चात्ताप हा आहे की, (१) ज्या गुन्ह्यांपासून तो तौबा करतो, त्याला करणे सोडून द्यावे. (२) याच्याकरीता अल्लाहच्या समक्ष पश्चात्ताप व्यक्त करावा. (३) भविष्यांत त्याला न करण्याचा निर्धार करावा. (४) जर त्याचा संबंध अल्लाहच्या सेवकांच्या हक्काशी आहे, तर ज्याचा हक्क मारला आहे. त्याचे निर्सन करावे. ज्यावर अत्त्याचार केला आहे, त्याची क्षमा मागावी. निव्वळ तोंडाने तौबा तौबा करून घेण्याला काही अर्थ नाही.

२) ही प्रार्थना ईमानवाले त्यावेळी, जेव्हा दांभिकांचा प्रकाश विझवून टाकण्यांत येईल. जसा की, सू.हदीदमध्ये येऊन चुकला. ईमानवाले म्हणतील, स्वर्गांत प्रवेश करेपर्यंत आमच्या या प्रकाशाला शिल्लक ठेव आणि शेवटपर्यंत बाकी राख.

३) काफिरांबरोबर जिहाद, करणे आणि दांभिकांशी त्यांच्यावर अल्लाहच्या मर्यादा (हदे) लागू करून देणे जेव्हा ते अशी कामे करतील, जे मर्यादाभंग करणारे आहेत.

४) म्हणजे प्रचार प्रसारांत सक्ती, आणि धर्मशास्त्राच्या आदेशांत कठोरता अंगीकारावी. कारण की लाथांचे भूत आहेत. जे गोष्टींनी मान्य करणार नाहीत. याचा अर्थ आहे की, आवाहनाची प्रयुक्ती कधी मृदुलतेचा अंगीकार करण्याचा तगादा करते आणि कधी कठोरतेचा. प्रत्येक ठिकाणी मृदुलता पण योग्य नाही. आणि प्रत्येक ठिकाणी सक्तीपण फायदेकारक नसते. प्रचार आणि आवाहनांमध्ये परिस्थिती व पात्रता, आणि व्यक्तीच्या अनुषंगाने मृदुता किंवा

कठोरता यांचा उपयोग करणे आवश्यक आहे.
५) म्हणजे काफिर आणि दांभिक दोघांचे ठिकाण नरकाग्नी आहे.
६) 'मसलुन' चा अर्थ आहे, कोण्या अशा परिस्थितीचे वर्णन करणे ज्यांत, वैशिष्टयात वेगळेपण आणि अनोखेपण असावे; कारण की, याच्या मार्फत एका दुसऱ्या स्थितीची ओळख होऊन जावी. जी वैशिष्टयात वेगळी. अर्थ हा झाला की, त्या काफिरांच्या अवस्थेसाठी अल्लाहतआलाने एक दृष्टांत सांगितला आहे. जो नूह आणि लूतची पत्नी (यांचा) आहे.
७) येथे दगाबाजीने अभिप्रेत शील संवर्धनात दगाबाजी नाही. कारण की, या गोष्टीवर एकमत आहे की कोण्या पैगंबराची पत्नी कुकर्म करणारी असत नाही. (फत्हुल कदीर) खयानत (दगाबाजी) ने अभिप्रेत आहे की, यांनी आपल्या पतींवर ईमान आणले नाही. दांभिकपणात व्यस्त राहिलेत. आणि त्यांची सहानुभूती आपल्या काफिर समाजाबरोबर राहिली. म्हणून नूह ची पत्नी, ह.नूह عليه السلام च्या बाबतीत लोकांना सांगत असे की, हा तर वेडा आहे. आणि ह.लूत عليه السلام ची पत्नी आपल्या लोकांना, घरात येणाऱ्या पाहुण्यांची बातमी पोहचवीत असे. काही म्हणतात की या दोघी आपल्या समाजाच्या लोकांमध्ये आपल्या पतीच्या चुगल्या करीत असत.
८) म्हणजे नूह عليه السلام आणि लूत عليه السلام ते अल्लाहचे पैगंबर असून सुद्धा जे अल्लाहचे सानिध्य प्राप्त सेवक असतात, आपल्या पत्नींना अल्लाहच्या शिक्षेपासून वांचवू शकले नाही.
९) हे त्यांना कयामतच्या दिवशी सांगण्यांत येईल, किंवा मृत्युच्या वेळी सांगण्यात आले. काफिरांचा हा दृष्टांत, खास येथे उल्लेख करण्याचा उद्देश्य पवित्र पत्न्यांना तंबी करणे हा आहे की, त्या नि:संशय त्या पैगंबराच्या पवित्र घराची शोभा आहेत जे सर्व सृष्टीत सर्वाहून श्रेष्ठतम आहेत. परंतु त्यांना लक्षांत ठेवावयास पाहिजे की, जर त्यांनी पैगंबराचा विरोध केला किंवा त्यांना त्रास दिला, तर त्या पण अल्लाहच्या पकड मध्ये येऊ शकतात. आणि जर असे होऊन गेले तर मग कोणी त्यांना वांचविणारा असणार नाही.
१०) म्हणजे त्यांना प्रोत्साहन, दृढनिश्चय, धर्मावर जमून राहणे आणि कठीण परिस्थितीत सहनशक्ती राखण्याकरीता. तसेच हे दाखविण्याकरीता की, कुफ्रची सवलत आणि आवड, ईमानवाल्यांचे काही बिघाडू शकत नाही. जशी फिरऔनची पत्नी आहे. जी आपल्या वेळच्या सर्वांत मोठ्या काफिराच्या अधिनस्थ होती. परंतु तो आपल्या पत्नीला ईमानापासून अडवूंशकला नाही.
११) ह.मर्यमच्या उल्लेखाने उद्देश्य हा सांगण्याचा आहे की, असे असून सुद्धा की, ती एका वाईट समाजांत राहत होती. परंतु अल्लाहने त्यांना इहलोकांत आणि परलोकांत प्रतिष्ठा आणि चमत्कार बहाल केला आणि सकल जगाच्या स्त्रियांवर त्यांना श्रेष्ठत्व दिले.
१२) अल्लाहच्या शब्दांनी अभिप्रेत अल्लाहचे धर्मशास्त्र आहे.
१३) म्हणजे अशा लोकांमधून किंवा घराण्यामधून होती, जे आज्ञाधारक, उपासना करणारा आणि सुधारणा आणि आज्ञाधारकतेत प्रतिष्ठित होते. स्वर्गवासी स्त्रियांमध्ये सर्वांत श्रेष्ठ ह. खदीजः ह.फातमा, ह. मर्यम आणि फिरऔनाची पत्नी ह.आसिया आहेत. (मुसनद अहमद, २१३/१ मजमुआ जवाईन २२३/९ अल् सहयतुल अल्बानी क्र.१८०७) एका दुसऱ्या हदीसमध्ये सांगितले, ''पुरुषांमध्ये परिपूर्ण तर पुष्कळ झाले आहेत; परंतु स्त्रियांमध्ये परिपूर्ण (कामिल) फक्त फिरऔनाची पत्नी आसिया, मर्यम बिन्ते इमरान, आणि खदीजाः बिन्ते खुवैलिद आहेत आणि आयेशा رضي الله عنها चे श्रेष्ठत्व स्त्रियांवर असे आहे, जशी 'सरीद' ला सर्व जेवणांमध्ये श्रेष्ठत्व प्राप्त आहे. (स. बुखारी)

महावाक्ये ३० (६७) सू. मुल्क रुकूअ २

ايَاتُهَا ٣٠ (٦٧) سُوْرَةُ الْمُلْكِ مَكِّيَّةٌ (٧٧) رُكُوْعَاتُهَا ٢

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

تَبٰرَكَ الَّذِيْ بِيَدِهِ الْمُلْكُ ۡ وَهُوَ عَلٰى كُلِّ شَيْءٍ قَدِيْرُ ۙ﴿١﴾

फारच धन्य आहे तो (अल्लाह) ज्याच्या हातांत बादशाही आहे[१] आणि तो सर्व सामर्थ्यवान आहे. (१)

الَّذِيْ خَلَقَ الْمَوْتَ وَالْحَيٰوةَ لِيَبْلُوَكُمْ اَيُّكُمْ اَحْسَنُ عَمَلًا ۭ وَهُوَ الْعَزِيْزُ الْغَفُوْرُ ۙ﴿٢﴾

ज्याने मृत्यू आणि जीवन यासाठी निर्माण केले की, तुम्हास पडताळून पहावे की तुमच्यातून चांगली कामे कोण करतो[२] आणि तो परमसमर्थ आणि क्षमाकर्ता आहे. (२)

الَّذِيْ خَلَقَ سَبْعَ سَمٰوٰتٍ طِبَاقًا ۭ مَا تَرٰى فِيْ خَلْقِ الرَّحْمٰنِ مِنْ تَفٰوُتٍ ۭ فَارْجِعِ الْبَصَرَ ۙ هَلْ تَرٰى مِنْ فُطُوْرٍ ﴿٣﴾

ज्याने सात आकाशे एकावर एक निर्माण केलीत. (तर हे प्रेक्षका!) तुला अल्लाह परम दयाळूच्या निर्मितीमध्ये काही तफावत दिसून येणार नाही.[३] पुन्हा नजर कर आणि पहा की, काय कोणी तडा सुद्धा तुला दिसून येतो?[४] (३)

ثُمَّ ارْجِعِ الْبَصَرَ كَرَّتَيْنِ يَنْقَلِبْ اِلَيْكَ الْبَصَرُ خَاسِئًا وَّهُوَ حَسِيْرٌ ﴿٤﴾

मग पुन्हा दुसऱ्यांदा पाहून घे, तुझी नजर लाजीरवाणी होऊन, थकून भागून तुझ्याचकडे परत येईल.[५] (४)

✪ याच्या महात्म्यात अनेक रिवायती आल्या आहेत. याच्यातून फक्त थोड्याशा रिवायती खरी किंवा हसन आहेत. एकात रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''अल्लाहच्या पुस्तकांत एक अध्याय आहे. ज्यात फक्त ३० महावाक्ये आहेत. हा माणसाची शिफारस करील, येथ पावेतो की, त्याला क्षमा करून देण्यात येईल.'' (तिर्मिझी, अबुदाऊद, इब्ने माजा व मुसनद अहमद २११/२,३२१) दुसऱ्या रिवायतीमध्ये आहे, ''कुरआन मजीदमध्ये एक अध्याय आहे. जो आपल्या वांचणाऱ्यांकडून लढेल. येथपावेतो की, त्याला स्वर्गांत दाखल करवून देईल.'' (मजमऊल जवाईद) तिर्मिझीच्या रिवायतीमध्ये हे पण सांगण्यांत आले आहे की, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम रात्री झोपण्यापूर्वी सू.अलीफ लाम मीम सजदः आणि सू.मुल्क अवश्य वांचत असत. (अबवाब फजाईले कुरआन) एक रिवायत शेख अल्बानीने अल्सहीयः मध्ये नोंदली आहे. 'सू.मुल्क कब्रच्या अजाबपासून रोकणारी आहे.' म्हणजे याचा वाचणारा, आशा आहे की, कबरच्या अजाबपासून सुरक्षित राहील. या अटीवर की तो इस्लामच्या आदेश आणि कर्तव्याची पूर्तता करणारा असावा.

१) 'तबारक' 'बर्‌कतुन' पासून आहे. विपुलता आणि अधिकतेच्या अर्थांत. काहींनी अर्थ केला आहे, सृष्टीच्या वैशिष्ट्यांत उच्च आणि श्रेष्ठ. ''याच्याच हातांत राज्य आहे.'' म्हणजे प्रत्येक प्रकारचे सामर्थ्य आणि वर्चस्व त्यालाच प्राप्त आहे. तो ब्रम्हाडांत ज्या प्रकारचा हेरफेर करील, कोणी त्याला अडवू शकत नाही. जो श्रीमंताला फकीर आणि फकीराला श्रीमंत करून टाकेल. जो रावाला रंक आणि रंकाला राव करून टाकेल. कोणी त्याच्या ज्ञानांत आणि मर्जींत दखल देऊं शकत नाही.

२) रुह (आत्मा) एक अशी वस्तू आहे जिला पाहता येत नाही. की ज्या शरीराशी तिचा संबंध आणि मिलन होऊन जाईल, ते जिवंत म्हणविले जाते. आणि ज्या शरीराशी याचा संबंध विच्छेद होऊन जाईल, ते मृत होऊन जाते. त्याने या तात्पुरत्या जीवनाच्या क्रमाला, ज्याच्यानंतर मृत्यू आहे, यासाठी कायम केले आहे की, त्याने पडताळून पहावे की, जीवनाचा बरोबर उपयोग कोण करतो? जो त्याचा ईमान आणि अल्लाहच्या आज्ञापालनांत उपयोग करील, त्याच्यासाठी उत्कृष्ट मोबदला आहे आणि दुसऱ्यांकरीता शिक्षा.

३) म्हणजे कोणी एकमेकांच्या विरुद्ध, कोणी वक्रता, कोणी व्यत्यय, किंबहुना ते बिल्कुल सरळ आणि बरोबर आहे. जे या गोष्टीवर प्रामाण्य करते की, या सर्वांचा निर्माणकर्ता फक्त एकच आहे, अनेक नाहीत.

४) काही वेळा दुसऱ्यांदा लक्षपूर्वक पाहिल्याने, काही दोष दिसून येतो. अल्लाहतआला आवाहन करीत आहे की, वारंवार पहा की, तुम्हास कोणी तडा दृष्टीस पडतो काय?

५) ही आणखी ताकीद आहे, ज्याचा उद्देश्य आपले महान सामर्थ्य आणि एकच असण्याला स्पष्ट करणे आहे.

وَلَقَدْ زَيَّنَّا السَّمَآءَ الدُّنْيَا بِمَصَابِيحَ وَجَعَلْنٰهَا رُجُومًا لِّلشَّيٰطِينِ وَاَعْتَدْنَا لَهُمْ عَذَابَ السَّعِيرِ ⑤

आणि आम्ही जगाच्या आकाशाला दिव्यांनी सुशोभित करून ठेवले आहे आणि त्यांना शैतानांना मारण्याचे साधन बनवून [१] दिले आहे आणि शैतानांसाठी आम्ही नरकाग्नीची जाळणारी शिक्षा तयार करून ठेवली आहे. (५)

وَلِلَّذِينَ كَفَرُوا بِرَبِّهِمْ عَذَابُ جَهَنَّمَ ۖ وَبِئْسَ الْمَصِيرُ ⑥

आणि आपल्या पालनकर्त्यास नाकारणाऱ्यांसाठी, नरकाग्नीची शिक्षा आहे, जी फारच वाईट जागा आहे. (६)

إِذَآ اُلْقُوا فِيهَا سَمِعُوا لَهَا شَهِيقًا وَّهِيَ تَفُورُ ⑦

जेव्हा याच्यांत टाकले जातील तर इचा फार जोराचा आवाज ऐकतील आणि ती भडकत [२] असेल (७)

تَكَادُ تَمَيَّزُ مِنَ الْغَيْظِ ۖ كُلَّمَآ اُلْقِيَ فِيهَا فَوْجٌ سَاَلَهُمْ خَزَنَتُهَآ اَلَمْ يَاْتِكُمْ نَذِيرٌ ⑧

असे वाटेल की आताच रागाने फाटून [३] पडेल; जेव्हा कोणी इच्यांत कोणी टोळी टाकली जाईल तिला नरकाग्नीचे रखवालदार विचारतील की, काय तुमच्याजवळ भिवविणारा कोणी आला नव्हता? [४] (८)

قَالُوا بَلٰى قَدْ جَآءَنَا نَذِيرٌ ۙ فَكَذَّبْنَا وَقُلْنَا مَا نَزَّلَ اللّٰهُ مِنْ شَيْءٍ ۚ اِنْ اَنْتُمْ اِلَّا فِي ضَلٰلٍ كَبِيرٍ ⑨

ते जबाब देतील नि:संशय आला तर होता परंतु आम्ही त्याला खोटे ठरवले आणि म्हटले की, अल्लाहतआलाने काही पण अवतीर्ण केले नाही. तुम्ही मोठ्या भ्रमांत पडला आहात. [५] (९)

وَقَالُوا لَوْ كُنَّا نَسْمَعُ اَوْ نَعْقِلُ مَا كُنَّا فِيٓ اَصْحٰبِ السَّعِيرِ ⑩

आणि म्हणतील की जर आम्ही ऐकले असते किंवा अक्कल बाळगली असती, तर नर्कवाशियांत (शामील) झालो नसतो. [६] (१०)

فَاعْتَرَفُوا بِذَنْبِهِمْ ۚ فَسُحْقًا لِّاَصْحٰبِ السَّعِيرِ ⑪

त्यांनी आपली पातके कबूल करून घेतलीत. [७] आता या नर्कवाश्यांचे तोंड काळे होवो! [८] (११)

اِنَّ الَّذِينَ يَخْشَوْنَ رَبَّهُمْ بِالْغَيْبِ لَهُمْ مَّغْفِرَةٌ وَّاَجْرٌ كَبِيرٌ ⑫

नि:संशय जे लोक आपल्या पालनकर्त्याला बिन पाहिल्या भित राहतात; त्यांच्या करीता क्षमा आहे आणि मोठा मोबदला आहे. [९] (१२)

१) येथे नक्षत्रांचे दोन उद्देश्य सांगण्यात आले आहेत. एक आकाशाची शोभा, कारण की ते दिव्यांसारखे जळतांना दिसतात. दुसरे जर शैतान आकाशाकडे जाण्याचा प्रयत्न करतात, तेव्हा हे अंगारे बनून त्यांच्यावर पडतात. तिसरा त्यांचा उद्देश्य हा आहे, जसे दुसऱ्या ठिकाणी सांगण्यात आले आहे की, याच्याने जमिनीत आणि समुद्रांत रस्त्यांचे मार्गदर्शन होते.

२) 'शहीक' त्या आवाजाला म्हणतात, जो गाढव पहिल्यांदा काढते. हा अत्यंत वाईट आणि बदसूर आवाज असतो. जहन्नम सुद्धा गाढवांप्रमाणे ओरडत राहील आणि विस्तवांवर ठेवलेल्या हंडीप्रमाणे उसळत असेल.

३) किंवा अति क्रोध आणि रागाने, तिचे भाग एक दुसऱ्यापासून वेगळे होऊन जातील. हा नरकाग्नी काफिरांना पाहून क्रोधायमान होऊन जाईल. ज्याची जाणीव अल्लाहतआला त्याच्यांत निर्माण करून देईल. अल्लाहतआला करीता ही जाणीव आणि समज नरकाग्नीत, निर्माण करून देणे काही कठीण नाही.

४) ज्यामुळे आज तुम्हांस नरकाग्नीच्या शिक्षेची गोडी चाखावी लागत आहे.

५) म्हणजे आम्ही पैगंबरांना मान्यता देण्याऐवजी, त्यांना खोटे ठरविले. आकाशी ग्रंथांना सुरवातीपासूनच नाकारले; येथपावेतो की, आम्ही अल्लाहच्या पैगंबरांनाच म्हटले की, तुम्ही मोठ्या भ्रमांत पडला आहांत.

६) म्हणजे लक्षपूर्वक आणि ध्यान देऊन ऐकतो, आणि त्यांच्या गोष्टींना आणि उपदेशांना कानांत सांठवून ठेवले असते; अशाच प्रकारे अल्लाहने दिलेल्या अक्कलने सुद्धा विचार केला असता, समजून घेतले असते, तर आज आम्ही नर्कवासियांमध्ये शामिल झालो नसतो.

७) ज्यामुळे शिक्षेला पात्र ठरलो आणि तो अपराध हा आहे की, कुफ्र व पैगंबरांना खोटे ठरवले.

८) म्हणजे आता त्यांच्यासाठी अल्लाहकडून आणि त्याच्या दयेकडून दुरीच दूरी आहे. काही म्हणतात की, 'सूहकुन' नरकाग्नीच्या एका दरीचे नाव आहे.

९) हे कुफ्रवाले आणि पाखंडी लोक यांच्या तुलनेत ईमानवाल्यांचा आणि त्या देणग्यांचा उल्लेख आहे, ज्या त्यांना कयामतच्या दिवशी अल्लाहतआलाकडून मिळतील. 'बिल्गयब' चा एक अर्थ हा आहे की, त्यांनी अल्लाहला पाहिले तर नाही, पण पैगंबरांना मान्यता देत, ते अल्लाहच्या शिक्षेकडून भित राहिले. दूसरा अर्थ हा पण होऊं शकतो की, लोकांच्या दृष्टीपासून अदृष्ट, म्हणजे एकांतात अल्लाहला भित राहिले.

وَاَسِرُّوْا قَوْلَكُمْ اَوِ اجْهَرُوْا بِهٖ ؕ اِنَّهٗ عَلِيْمٌۢ بِذَاتِ الصُّدُوْرِ ﴿١٣﴾

तुम्ही आपल्या गोष्टींना लपवा अथवा जाहीर करा [१] तो तर हृदयस्थ गुप्त गोष्टींशी पण खूप वाकब आहे. [२] (१३)

اَلَا يَعْلَمُ مَنْ خَلَقَ ؕ وَهُوَ اللَّطِيْفُ الْخَبِيْرُ ﴿١٤﴾

काय तो पण गैर माहितगार असूंशकतो, जो स्वत:च निर्माणकर्ता असावा? [३] मग सूक्ष्मदर्शी आणि बहूश्रृत असावा [४] (१४)

هُوَ الَّذِيْ جَعَلَ لَكُمُ الْاَرْضَ ذَلُوْلًا فَامْشُوْا فِيْ مَنَاكِبِهَا وَكُلُوْا مِنْ رِّزْقِهٖ ؕ وَاِلَيْهِ النُّشُوْرُ ﴿١٥﴾

तोच तर आहे, ज्याने तुमच्याकरीता जमिनीला नरम आणि सारखी करून दिली. [५] कारण की, तुम्ही तिच्या रस्त्यांत चालत फिरत रहावे आणि [६] अल्लाहने दिलेला शेर [७] खा व प्या. त्याच्याचकडे तुम्हांस जिवंत होऊन, उठून उभे रहाणे आहे. (१५)

ءَاَمِنْتُمْ مَّنْ فِي السَّمَآءِ اَنْ يَّخْسِفَ بِكُمُ الْاَرْضَ فَاِذَا هِيَ تَمُوْرُ ﴿١٦﴾

काय तुम्ही या गोष्टींकडून निर्भय होऊन गेलात की, जो आकाशांत आहे, तो तुम्हास जमिनींत धसवून टाकेल आणि अचानक जमीन झोके खाऊ लागेल. [८] (१६)

اَمْ اَمِنْتُمْ مَّنْ فِي السَّمَآءِ اَنْ يُّرْسِلَ عَلَيْكُمْ حَاصِبًا ؕ فَسَتَعْلَمُوْنَ كَيْفَ نَذِيْرِ ﴿١٧﴾

किंवा काय तुम्हांस या गोष्टींचा अंदेशा नाही की, आकाशवाला तुमच्यावर दगडांचा वर्षाव करून टाकील? [९] मग तर तुम्हांस ठाऊकच होऊन जाईल की माझे भिवविणे कसे होते. [१०] (१७)

وَلَقَدْ كَذَّبَ الَّذِيْنَ مِنْ قَبْلِهِمْ فَكَيْفَ كَانَ نَكِيْرِ ﴿١٨﴾

आणि यांच्या पूर्वीच्या लोकांनी सुद्धा खोटे ठरवले होते, तर पहा त्यांच्यावर माझी शिक्षा कशी काय झाली? (१८)

१) हे पुन्हा काफिरांना संबोधन आहे. अर्थ आहे की, तुम्ही रसूलुल्लाह ﷺ च्या बाबतीत गुप्तपणे गोष्टी करा किंवा उघड गोष्टी करा. अल्लाहला सर्व ठाऊक आहेत. त्याच्यापासून कोठलीही गोष्ट गुप्त नाही.

२) म्हणजे तो तर हृदयस्थ रहस्य आणि मनाच्या भेद्वांपर्यंत वाकबगार आहे. तुमच्या गोष्टी कशाप्रकारे गुप्त राहूंशकतात?

३) म्हणजे हृदये आणि मने, आणि त्यांच्यात निर्माण होणाऱ्या कल्पना, सर्वांचा निर्माणकर्ता, अल्लाहतआलाच आहे. तर काय तो आपल्या निर्मितीपासून अजाण राहू शकतो? प्रश्नचिन्ह नकारासाठी आहे. म्हणजे (अजाण) राहू शकत नाही.

४) लतीफचा अर्थ आहे सुक्ष्मदर्शी. ज्याचे ज्ञान इतके सुक्ष्म आहे की मनांत उठणाऱ्या गोष्टींना तो जाणतो.

५) 'जलुल' चा अर्थ आज्ञाधारकाचा आहे. जो तुमच्यासमोर झुकून जाईल. शिरजोरी करणार नाही. म्हणजे जमिनीला तुमच्यासाठी नरम आणि सोपे करून दिले आहे. तिला अशाप्रकारे कठीण केले नाही की तुमचे तिच्यावर वस्ती करणे आणि चालणे फिरणे मुश्किल होऊन जावे.

६) 'मनाकिब' मनकबचे अनेकवचन आहे. येथे याच्याने अभिप्रेत तिचे मार्ग आणि आजुबाजू व कडा आहेत.

७) म्हणजे भूमीच्या पैदाशीमधून खा व प्या.

८) म्हणजे अल्लाहतआला जो आकाशावर म्हणजे महासिंहासनावर अधिष्ठीत आहे. हे काफिरांना भिवविण्यांत येत आहे की, आकाशावरील व्यक्तीत्व जेव्हा इच्छील तुम्हास जमिनीत धसवून टाकेल. म्हणजे त्याच जमिनीत तुमचे जाणे आणि रहाणे आहे. आणि तुमच्या अन्नसंपत्तीचे साठे आणि ती निघण्याचे ठिकाण आहे. अल्लाहतआला याच जमिनीला जी फारच स्थिर आहे, हालचाल आणि झोके देऊन, तुमच्या नष्ट करण्याचे साधन बनवू शकतो.

९) जसे याने लूतच्या लोकांवर आणि हत्तीवाल्या अब्रहा आणि त्याच्या सैन्यावर दगडांचा वर्षाव करून त्यांना नष्ट करून टाकले.

१०) परंतु या वेळी हे ज्ञान फायदेकारक होणार नाही.

काय हे आपल्यावर पंख पसरलेले आणि (कधी कधी) आखडून घेतात, अशा पक्ष्यांना पाहत नाहीत? [१] त्यांना (अल्लाह) परम दयाळूंच (हवेत आणि वातावरणांत) थांबवून आहे [२] काही संशय नाही की तो प्रत्येक वस्तूंवर नजर राखतो. (१९)

أَوَلَمْ يَرَوْا إِلَى الطَّيْرِ فَوْقَهُمْ صَٰفَّٰتٍ وَيَقْبِضْنَ ۚ مَا يُمْسِكُهُنَّ إِلَّا الرَّحْمَٰنُ ۚ إِنَّهُ بِكُلِّ شَيْءٍ بَصِيرٌ ﴿١٩﴾

अल्लाहच्या शिवाय तुमचे ते कोणते लष्कर आहे, जे तुमची मदत करूंशकेल. [३] काफिरतर निव्वळ फसगतीत आहेत. [४] (२०)

أَمَّنْ هَٰذَا الَّذِي هُوَ جُندٌ لَّكُمْ يَنصُرُكُم مِّن دُونِ الرَّحْمَٰنِ ۚ إِنِ الْكَٰفِرُونَ إِلَّا فِي غُرُورٍ ﴿٢٠﴾

जर अल्लाहतआला आपले अन्नपाणी रोकून घेईल, तर सांगा कोण आहे, जो तुम्हांस अन्नपाणी देईल? [५] परंतु (काफिर) तर शिरजोरी आणि (सत्यापासून) पळ काढण्यावर अडून बसले आहेत. [६] (२१)

أَمَّنْ هَٰذَا الَّذِي يَرْزُقُكُمْ إِنْ أَمْسَكَ رِزْقَهُ ۚ بَل لَّجُّوا فِي عُتُوٍّ وَنُفُورٍ ﴿٢١﴾

बरे तो माणूस जास्त सन्मार्गोमुख आहे, जो कोणी आपले तोंड पालथे घालून चालतो [७] किंवा तो, जो सरळ सरळ मार्गावर चालला जात आहे. [८] (२२)

أَفَمَن يَمْشِي مُكِبًّا عَلَىٰ وَجْهِهِ أَهْدَىٰ أَمَّن يَمْشِي سَوِيًّا عَلَىٰ صِرَٰطٍ مُّسْتَقِيمٍ ﴿٢٢﴾

(आपण) सांगून द्या की तोच (अल्लाह) आहे, ज्याने तुम्हास निर्माण [९] केले आणि तुमचे कान डोळे आणि हृदये बनविली. [१०] तुम्ही फारच थोडे आभार मानतात [११] (२३)

قُلْ هُوَ الَّذِي أَنشَأَكُمْ وَجَعَلَ لَكُمُ السَّمْعَ وَالْأَبْصَٰرَ وَالْأَفْـِٔدَةَ ۖ قَلِيلًا مَّا تَشْكُرُونَ ﴿٢٣﴾

१) पक्षी जेव्हा हवेत उडतो, तेव्हा तो पंख पसरून देतो आणि कधी उड्डणांत पंख आखडून घेतो.

२) म्हणजे उड्डाणाच्या दर्म्यान या पक्ष्यांना सांवरून ठेवणारा कोण आहे, जो त्यांना जमिनीवर पडू देत नाही? हा अल्लाह परम दयाळूच्याच सामर्थ्याचा एक नमुना आहे.

३) हे प्रश्न विचारणे, समज देण्यासाठी आणि कान उघाडणीसाठी आहे. 'जुनदून' चा अर्थ आहे, सैन्य, जथ्था. म्हणजे कोणी सैन्य अथवा जथ्था असा नाही जो तुम्हास अल्लाहच्या शिक्षेपासून वांचवूशकेल.

४) ज्यांत त्यांना शैतानाने व्यस्त करून टाकले आहे.

५) म्हणजे अल्लाह जर पाऊस पाडणार नाही, किंवा जमिनीलाच कोण्या उपजण्यापासून रोकून टाकील किंवा तयार झालेल्या पिकाला नष्ट करून टाकील; जसे की, काही काही वेळा तो असे करतो. ज्यामुळे तुमच्या खाद्यानाचा पुरवठा खंडीत होऊन जावा. जर अल्लाहतआला असे करून टाकेल, तर काय आणखी दुसरा कोणी आहे, जो अल्लाहच्या या मर्जीविरुद्ध तुम्हांस अन्नसंपत्ती मिळवून देईल?

६) म्हणजे हितोपदेशाच्या गोष्टीचा त्यांच्यावर काही परिणाम होत नाही; किंबहुना ते सत्त्यापासून शिरजोरी आणि त्यापासून पळ काढतात. आणि त्याचा तिरस्कारच करतात. यापासून बोध घेत नाही आणि चिंतन आणि मनन पण करीत नाही.

७) तोंड पालथे घालून चालणाऱ्यांना उजवीकडे डावीकडे आणि पुढे काही दिसवत नाही. तसेच ते ठोकर खाण्यापासून वांचू शकत नाही. काय असा मनुष्य आपल्या ध्येयाप्रत पोहचूंशकतो ? खचितच पोहचूंशकत नाही. अशाच प्रकारे जगामध्ये अल्लाहच्या आज्ञाभंगामध्ये बुडालेला मनुष्य, परलोकातील सफलतेपासून वंचित् राहील.

८) ज्यांत काही वक्रता आणि फेरबदल नसेल आणि ज्याला पुढे आणि उजवीकडे डावीकडे सुद्धा दिसत असेल; उघड आहे हा मनुष्य आपल्या ध्येयाप्रत पोहचून जाईल. म्हणजे अल्लाहतआलाच्या आज्ञापालनाचा सरळमार्ग अंगीकारणारा परलोकांत विजयी होईल. काही म्हणतात की, हे ईमानवाला आणि काफिर चेहऱ्याच्या वाटेने नरकाग्नीत नेले जातील; आणि ईमानवाले सरळ आपल्या पायांनी चालत स्वर्गांत जातील. जसे काफिरांच्या बाबतीत दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''आम्ही त्यांना कयामतच्या दिवशी तोंडावाटे एकत्र गोळा करू.'' (सू. बनी इस्राईल-१७)

९) म्हणजे पहिल्यावेळी निर्माण करणारा सुद्धांअल्लाहच आहे.

१०) ज्याच्याने तुम्ही ऐकू शकतात, पाहूंशकतात आणि अल्लाहच्या सृष्टीत चिंतन मनन करून अल्लाहला समजू शकतात. तीन सामर्थ्यांचा उल्लेख केला आहे. ज्याच्याने मनुष्य ऋतुंचा, कालमानांचा आणि अनुकूल प्रतिकुलतेचा विचार करू शकतो. हे एक प्रकारे तर्क पूर्ण करणे सूद्धाआहे. आणि अल्लाहच्या या देणग्यांवर आभार न मानण्यांची निर्भत्सना सुद्धा. म्हणून पुढे सांगितले, तुम्ही फारच कमी आभार मानतात.

११) म्हणजे शुक्रन कलीलन् किंवा जमानन् कलीलन किंवा कमी आभार प्रदर्शनाने अभिप्रेत त्यांच्याकडून आभार न मानणे आहे. (फत्हुल कदीर)

قُلْ هُوَ الَّذِيْ ذَرَاَكُمْ فِي الْاَرْضِ وَاِلَيْهِ تُحْشَرُوْنَ ﴿٢٤﴾

(आपण) सांगून द्या की, तो तोंच आहे ज्याने तुम्हास भूमीत फैलाविले आणि त्याच्याचकडे तुम्ही (सर्व) एकत्र गोळा केले जाल.[१] (२४)

وَيَقُوْلُوْنَ مَتٰى هٰذَا الْوَعْدُ اِنْ كُنْتُمْ صٰدِقِيْنَ ﴿٢٥﴾

आणि (काफिर) विचारतात की तो वायदा केव्हा जाहीर होणार , जर तुम्ही खरे आहांत (तर सांगा!)[२] (२५)

قُلْ اِنَّمَا الْعِلْمُ عِنْدَ اللّٰهِ ۠ وَاِنَّمَآ اَنَا نَذِيْرٌ مُّبِيْنٌ ﴿٢٦﴾

आपण सांगून द्या की, याचे ज्ञान तर (फक्त) अल्लाहलाच आहे.[३] मी तर उघडपणे भय सूचविणारा[४] आहे. एवढेच (२६)

فَلَمَّا رَاَوْهُ زُلْفَةً سِيْٓـَٔتْ وُجُوْهُ الَّذِيْنَ كَفَرُوْا وَقِيْلَ هٰذَا الَّذِيْ كُنْتُمْ بِهٖ تَدَّعُوْنَ ﴿٢٧﴾

जेव्हा हे लोक या[५] वायद्याला जवळ येऊन ठेपले पाहतील, त्यावेळी या काफिरांची तोंडे वाईट होऊन जातील;[६] आणि सांगून देण्यात येईल की, हे तेच आहे ज्यांची तुम्ही मागणी करीत होता.[७] (२७)

قُلْ اَرَءَيْتُمْ اِنْ اَهْلَكَنِيَ اللّٰهُ وَمَنْ مَّعِيَ اَوْ رَحِمَنَا ۙ فَمَنْ يُّجِيْرُ الْكٰفِرِيْنَ مِنْ عَذَابٍ اَلِيْمٍ ﴿٢٨﴾

आपण सांगून द्या की, बरे! जर मला आणि माझ्या साथीदारांना अल्लाहतआला नष्ट करून टाकेल, किंवा आमच्यावर दया करेल, (तर प्रत्येक स्थितीत) हे तर सांगा की, काफिरांना दु:खदायक शिक्षेपासून कोण वांचवील?[८] (२८)

قُلْ هُوَ الرَّحْمٰنُ اٰمَنَّا بِهٖ وَعَلَيْهِ تَوَكَّلْنَا ۚ فَسَتَعْلَمُوْنَ مَنْ هُوَ فِيْ ضَلٰلٍ مُّبِيْنٍ ﴿٢٩﴾

आपण सांगून द्या की तोच परमदयाळूंआहे. आम्ही त्याच्यावर ईमान आणून चुकलो[९] आणि त्याच्यावरच आमचा भरवसा[१०] आहे. तुम्हाला लवकरच ठाऊक होऊन जाईल की, उघड भ्रमांत कोण आहे?[११] (२९)

१) म्हणजे मनुष्यांना निर्माण करून, भूमीत पसरविणारा पण तोंच आहे आणि कयामतच्या दिवशी पण हे सर्व त्याच्याच जवळ जमा होतील, कोण्या दुसऱ्याजवळ नाही.

२) हे काफिर उपहास म्हणून, आणि कयामतला कधीही घडून न येणारी समजून म्हणत असत.

३) त्याच्या वांचून अन्य कोणी जाणत नाही, दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''सांगून द्या याचे ज्ञान फक्त माझ्या पालनकर्त्यालाच आहे.'' (सू.अअराफ-१८७)

४) म्हणजे माझे काम तर या परिणामापासून भिवविणे आहे. जो मला पाखंड म्हणण्याने तुमचा होईल. दुसऱ्या शब्दांत माझे काम भिवविणे आहे. अदृष्टाच्या बातम्या सांगणे नाही. याशिवाय की स्वत: अल्लाहतआला मला सांगून देईल.

५) 'रअवहु' म्हणजे कयामतची शिक्षा आहे.

६) म्हणजे फजिती, भयानकता आणि दहशती यांच्या चेहऱ्यांवर प्रतिबिंबीत होत असतील. ज्याला दुसऱ्या ठिकाणी चेहरे काळे ठिक्कर पडून जाण्याने संबोधित केले आहे. (सू.आले इमरान-१०६)

७) तद्दऊन आणि 'तुदऔन' चा एकच अर्थ आहे. म्हणजे ही शिक्षा जी तुम्ही पाहात आहात. तीच आहे जिची तुम्ही जगांत लवकर मागणी करीत होता. जसे सू.सॉद-१६ आणि सू.अन्फाल-३२ वगैरे मध्ये आहे.

८) अर्थ हा आहे की या काफिरांना अल्लाहच्या शिक्षेपासून वांचविणारा कोणी नाही. मग जरी अल्लाहतआला आपल्या पैगंबरांना आणि त्याच्यावर ईमान आणणाऱ्यांना मृत्यू किंवा ठार करून टाकण्याने नष्ट करून टाकतील. किंवा त्यांना सवलत देऊन टाकेल. किंवा हा अर्थ आहे की, आम्ही ईमान असून सुद्धा भय आणि आशेच्या दर्म्यान आहोत; तर मग तुम्हास तुमचे कुफ्र असताना शिक्षेपासून कोण वांचवील?

९) म्हणजे त्याच्या एकच असण्यावर, म्हणूनच त्याच्या बरोबर कोणाला सरकतदार ठरवित नाहीत.

१०) आणखी कोणावर नाही. आम्ही आमची सर्व प्रकरणे त्याच्याच हवाली करतो, कोण्या दुसऱ्याच्या नाही. जसे मुशरीक लोक करतात.

११) तुम्ही असो अथवा आम्ही! याच्यात काफिरांकरीता कडक धमकावणी आहे.

قُلْ أَرَءَيْتُمْ إِنْ أَصْبَحَ مَآؤُكُمْ غَوْرًا فَمَن يَأْتِيكُم بِمَآءٍ مَّعِينٍ ﴿٣٠﴾

आपण सांगून द्या की, बरे ! हे तर सांगा की, जर (तुमच्या पिण्याचे) पाणी जमीन शोषून घेईल, तर कोण आहे जो तुमच्याकरीता शुद्ध पाणी आणेल?[१] ३०

سُورَةُ الْقَلَمِ مَكِّيَّةٌ (٦٨) (٢) آياتها ٥٢ ركوعاتها ٢

## (६८) सू. अल-कलम

महावाक्ये ५२ रुकूअ २

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

نٓ ۚ وَالْقَلَمِ وَمَا يَسْطُرُونَ ﴿١﴾

नून[२] लेखणीची शपथ[३] आणि त्याची जे काही की, ते (देवदूत) लिहीतात[४] १

مَآ أَنتَ بِنِعْمَةِ رَبِّكَ بِمَجْنُونٍ ﴿٢﴾

तूंआपल्या पालनकर्त्याच्या कृपेने वेडा नाहीस[५] २

وَإِنَّ لَكَ لَأَجْرًا غَيْرَ مَمْنُونٍ ﴿٣﴾

आणि नि:संशय तुझ्यासाठी कधीही न संपणारा मोबदला आहे.[६] ३

وَإِنَّكَ لَعَلَىٰ خُلُقٍ عَظِيمٍ ﴿٤﴾

आणि नि:संशय तू फार मोठ्या (उत्तम) नितिमत्तेवर आहेस[७] ४

فَسَتُبْصِرُ وَيُبْصِرُونَ ﴿٥﴾

तर लवकरच तू पण पाहून घेशील आणि हे पण पाहून घेतील.[८] ५

بِأَييِّكُمُ الْمَفْتُونُ ﴿٦﴾

की तुमच्यातून वेडा कोण आहे ६

१) 'गौरुन' चा अर्थ आहे कोरडे होऊन जाणे किंवा इतक्या खोलीत चालले जाणे की, तेथून पाणी काढणे अशक्य व्हावे, म्हणजे जर अल्लाहतआला पाणी आटवून टाकेल की, त्याचे अस्तित्व तेथेच संपून जावे किंवा इतक्या खोलवर करून देईल की, सर्व इंजीने पाणी काढण्यास असमर्थ होऊन जावीत. तर सांगा ! मग कोण आहे, जो तुम्हास वाहते, स्वच्छ आणि शुद्ध पाणी मिळवून देईल? म्हणजे असा कोणी नाही. ही अल्लाहची कृपा आहे की तुमच्या पापार्जनाचे असून सुद्धा, तुम्हांस पाण्यापासून सुद्धा वंचित ठेवीत नाही.

२) 'नून' अशाच प्रकारे हुरुफे मुकत्तआत मधून आहे. जसे याच्यापूर्वी सॉद, काफ आणि दुसरे काही मागील अध्याय येऊन चुकले आहेत.

३) लेखणीची शपथ वाहिली. ज्याचे या अनुषंगाने महत्त्व आहे, की इच्यामार्फत वर्णन आणि स्पष्टीकरण होते. काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत ती खास लेखणी आहे, जिला अल्लाहतआलाने सर्वांत प्रथम निर्माण केले आणि तिला तकदीर (दैव) लिहिण्याचा हुकूम दिला. म्हणून तिने शेवटपर्यंत होणाऱ्या सर्व गोष्टी लिहून दिल्या. (सुनन तिर्मिझी तफसीर)

४) अर्थ आहे की, त्याची पण शपथ, जे लिहिणारे लिहितात किंवा अभिप्रेत देवदूत आहेत, जसे भाषांतराने स्पष्ट आहे.

५) हे शपथेचे उत्तर आहे, ज्यांत काफिरांच्या म्हणण्याचे खंडन आहे. ते आपणांस ﷺ वेडा म्हणत असत, ''अरे ! त्या मनुष्या ! ज्यावर कुरआन उतारले गेले आहे. खचित्‌च तू तर कोणी वेडा आहेस!'' (सू.अल्‌हिज्र-६)

६) पैगंबरीची कर्तव्ये पार पाडतांना, जेवढा जास्त त्रास सहन केला, आणि शत्रुंच्या गोष्टी तू ऐकल्या आहेस; यावर अल्लाहतआला कडून कधीही न संपणारा मोबदला मिळणार आहे. 'मन्न' चा अर्थ खंडीत करण्याचा आहे.

७) 'खुलूकीन अजीम' ने अभिप्रेत इस्लाम धर्म किंवा कुरआन आहे. अर्थ आहे की, तू त्या पद्धतीवर आहेस, ज्याचा हुकूम अल्लाहने तुला कुरआनामध्ये किंवा इस्लाम धर्मामध्ये दिला आहे किंवा याच्याने अभिप्रेत तो शिष्टाचार, नम्रता, कनवाळूपणा, विश्वसनीयता व सत्यता, दयाळूवृत्ती आणि कृपा आणि दुसरे चारित्र्य विषय सद्‌गुण आहेत; ज्यात आपण ﷺ पैगंबरीपूर्वी सुद्धा सुप्रसिद्ध होते आणि पैगंबरी नंतर सुद्धा याच्यात आणखी उच्चता आणि विशालता आली. म्हणूनच जेव्हा ह.आयेशा ؓ ला आपल्या चारित्र्याबद्दल विचारले गेले तेव्हा आपण फर्माविले, ''कान खुलूकहुल् कुरआन'' आपले गुणवैशिष्टय कुरआन होते. (स. मुस्लिम) ह.आयेशा ؓ चे हे उत्तर 'खुलूकीन अजीम' च्या चर्चित दोन्ही भावार्थांना समाविष्ट करणारा आहे.

८) आणि जेव्हा सत्त्य जाहीर होऊन जाईल, आणि सर्व पर्दे उठून जातील. आणि हे कयामतच्या दिवशी होईल. काहींनी याला बद्रच्या युद्धाशी संबंधित केले आहे.

اِنَّ رَبَّكَ هُوَ اَعۡلَمُ بِمَنۡ ضَلَّ عَنۡ سَبِيۡلِهٖ ۖ وَهُوَ اَعۡلَمُ بِالۡمُهۡتَدِيۡنَ (٧)

नि:संशय तुझा पालनकर्ता, आपल्या मार्गावरून बहकणाऱ्यांना, चांगल्या प्रकारे जाणतो. आणि तो सन्मार्गावर असलेल्या लोकांना पण चांगल्याप्रकारे जाणतो. (७)

فَلَا تُطِعِ الۡمُكَذِّبِيۡنَ (٨)

तर तू खोटे ठरवणाऱ्यांच्या कह्यांत येऊ नकोस[१] (८)

وَدُّوۡا لَوۡ تُدۡهِنُ فَيُدۡهِنُوۡنَ (٩)

ते तर हेच इच्छितात की, तू जरा नरम पडशील तर तेही नरम पडतील[२] (९)

وَلَا تُطِعۡ كُلَّ حَلَّافٍ مَّهِيۡنٍ ۙ (١٠)

आणि तू कोण्या अशा माणसाचा कह्या मानू नकोस, जो जास्त शपथा खाणारा (१०)

هَمَّازٍ مَّشَّآءٍۢ بِنَمِيۡمٍ ۙ (١١)

मानहानी झालेला नीच, लोकांचे दोष सांगणारा, चुगलखोर (११)

مَّنَّاعٍ لِّلۡخَيۡرِ مُعۡتَدٍ اَثِيۡمٍ ۙ (١٢)

भलाईपासून रोकणारा, मर्यादेबाहेर जाणारा, गुन्हेगार (१२)

عُتُلٍّۢ بَعۡدَ ذٰلِكَ زَنِيۡمٍ ۙ (١٣)

निष्ठूर, मग त्या बरोबरच व्याभिचारामुळे जन्मलेला असावा[३] (१३)

اَنۡ كَانَ ذَا مَالٍ وَّبَنِيۡنَ ؕ (١٤)

त्याची शिरजोरी फक्त यासाठी आहे की, तो धनसंपन्न आणि पुत्रसंपन्न आहे.[४] (१४)

اِذَا تُتۡلٰى عَلَيۡهِ اٰيٰتُنَا قَالَ اَسَاطِيۡرُ الۡاَوَّلِيۡنَ (١٥)

जेव्हा त्याच्यासमोर आमची महावाक्ये वाचली जातात, तेव्हा सांगून देतो की, यातर पूर्वीच्या लोकांच्या भाकडकथा आहेत. (१५)

سَنَسِمُهٗ عَلَى الۡخُرۡطُوۡمِ (١٦)

आम्ही पण त्याच्या नाकाडावर डाग[५] देऊ (१६)

اِنَّا بَلَوۡنٰهُمۡ كَمَا بَلَوۡنَاۤ اَصۡحٰبَ الۡجَـنَّةِ ۚ اِذۡ اَقۡسَمُوۡا لَيَصۡرِمُنَّهَا مُصۡبِحِيۡنَ ۙ (١٧)

नि:संशय आम्ही त्यांना अशाचप्रकारे पडताळून पाहिले, ज्याप्रमाणे[६] आम्ही बागवाल्यांना[७] पडताळून पाहिले होते; जेव्हांकी त्यांनी शपथा वाहिल्या की सकाळ होताच, त्या बागेची फळे तोडून घेऊ[८] (१७)

وَلَا يَسۡتَثۡنُوۡنَ (١٨)

आणि इन्शा अल्लाह (पण) म्हटले नाही. (१८)

فَطَافَ عَلَيۡهَا طَآئِفٌ مِّنۡ رَّبِّكَ وَهُمۡ نَآئِمُوۡنَ (١٩)

तर त्या (बागे) वर तुझ्या पालनकर्त्याकडून एक आपत्ती चोहोबाजूने फिरून गेली आणि ते झोपेतच राहिले.[९] (१९)

فَاَصۡبَحَتۡ كَالصَّرِيۡمِ ۙ (٢٠)

तर तो बाग असा होऊन गेला, जसे कापलेले शेत[१०] (२०)

فَتَنَادَوۡا مُصۡبِحِيۡنَ ۙ (٢١)

आता सकाळ होतांच त्यांनी एकमेकांस आवाज दिला. (२१)

اَنِ اغۡدُوۡا عَلٰى حَرۡثِكُمۡ اِنۡ كُنۡتُمۡ صٰرِمِيۡنَ (٢٢)

की जर तुम्हास फळे उतारावयाची असतील, तर सकाळी सकाळीच आपल्या बागेत जाऊन पोहचा (२२)

فَانۡطَلَقُوۡا وَهُمۡ يَتَخَافَتُوۡنَ ۙ (٢٣)

मग ते सर्व हळूहळू अशा गोष्टी करीत चालले.[११] (२३)

اَنۡ لَّا يَدۡخُلَنَّهَا الۡيَوۡمَ عَلَيۡكُمۡ مِّسۡكِيۡنٌ ۙ (٢٤)

की आजच्या दिवशी कोणी गोर गरीब (माणसा) ने तुमच्या जवळ येऊ नये[१२] (२४)

وَّغَدَوۡا عَلٰى حَرۡدٍ قٰدِرِيۡنَ (٢٥)

आणि धांवत पळत सकाळी सकाळी पोहचूंन गेले आणि (समजत होते) की, लगेच आम्ही जातांच फळे तोडून घेऊ.[१३] (२५)

१) आज्ञापालनाने अभिप्रेत येथे हे जाहीर करणे आहे जे मनुष्य आपल्या सद्सद्विवेक बुद्धीच्या विरुद्ध करतो. म्हणजे मुशरीकांकडे झुकणे आणि त्यांच्या मान सन्मानाची आवश्यकता नाही.

२) म्हणजे ते तर इच्छितात की, तू तर त्यांच्या उपास्यांच्या बाबतीत नर्मीची वागणूक अंगीकारशील, तर ते सुद्धा तुझ्या बाबतीत नर्मीची वागणूक अंगीकारतील. परंतु निरर्थक गोर्ष्टींबरोबर डजोड करण्याचा परिणाम हाच होईल

की, असत्त्याचे पुजारी आपल्या चुकीच्या श्रेध्देला सोडण्यांत ढिले पडून जातील. म्हणून सत्यांत तडजोड आवाहनाच्या प्रयुक्तीत आणि पैगंबरी कामांत, फारच नुकसानदायक आहे.

३) हा त्या काफिरांच्या चारित्र्यहिनतेचा उल्लेख आहे, ज्यांच्यापासून पैगंबराला तडजोड करण्यापासून मना केले जात आहे, हे वाईट लक्षण कोण्या एका माणसाचे सांगितले गेले आहे की, सर्व साधारण काफिरांचे? पहिली गोष्ट जरी काही रिवायतींमधून सांगण्यात आली परंतु उद्देश्य सर्वसाधारण प्रत्येक तो मनुष्य आहे ज्यांत चर्चित वैशिष्टये आढळून येतील. जनीम म्हणजे 'वल्दुल् हराम' किंवा कुप्रसिद्ध आणि बदनाम.

४) म्हणजे चर्चित चारित्र्य विषयक निंदणीय गोष्टी तो यासाठी करतो की, अल्लाहने त्याला धनदौलत आणि संततीच्या देणग्यांनी बहाल केले आहे. म्हणजे तो आभार मानण्याऐवजी देणग्यांच्या प्रती कृतघ्नता व्यक्त करीत आहे. काहींनी याला 'वला तुतिअ्' शी संबंधीत ठरवले आहे. म्हणजे ज्या मनुष्यांत या खराब्या असतील, त्याची गोष्ट फक्त यासाठी मानली जाते की तो धन आणि संपत्ती बाळगतो?

५) काहींच्या जवळ याचा संबंध या जगाशी आहे. उदाहरणार्थ सांगितले जाते की, बद्रच्या युद्धात, या काफिरांच्या नाकांना तलवारीचे निशाण बनविण्यांत आले आणि काही म्हणतात की, कयामतच्या दिवशी, नर्कवासियांची निशाणी असेल की, त्यांच्या नाकांवर डाग दिला जाईल किंवा याचा अर्थ आहे चेहऱ्यांचे काळे होणे. जसे की, काफिरांचे चेहरे त्यादिवशी काळे होतील. काही म्हणतात की, काफिरांचा हा शेवट, इहलोक आणि परलोकांत दोन्ही ठिकाणी शक्य आहे.

६) अभिप्रेत मक्केवाले आहेत. म्हणजे आम्ही यांना धनदौलत बहाल केली की, त्यांनी अल्लाहचे आभार मानावेत न की कुफ्र आणि अहंकार परंतु त्यांनी कुफ्र आणि अहंकाराचा मार्ग अंगीकारला, तेव्हा आम्ही त्यांना भूक आणि दुष्काळात पिडीत केले. ज्यात ते नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या शापामुळे काही काळ ग्रस्त राहिले.

७) बागवाल्यांची गोष्ट अरबांमध्ये मशहूर होती. हा बाग सना (यमन) पासून दोन कोसाच्या अंतरावर होता. त्याचा मालक त्याच्या उत्पन्नांतून गोरगरीब आणि मोहताद यांच्यावर सुद्धा खर्च करीत असे. परंतु त्याच्य मृत्यूनंतर, त्याची संतती त्याची वारस बनली. तेव्हा ते म्हणू लागले की, आमचेच खर्च तर मोठ्या मुश्कीलीने पूर्ण होतात. आम्ही त्याच्या उत्पन्नातून गोरगरीब आणि मागणाऱ्यांना कसे द्यावे बरे ? म्हणून अल्लाहतआलाने बागेलाच नष्ट करून टाकले. असे म्हणतात की, ही घटना ह.ईसा عليه السلام च्या आकाशावर उचलून घेण्याच्या थोड्याच काळानंतर घडली. (फत्हूल कदीर)

८) 'सरम' चा अर्थ आहे फळ (तोडणे) आणि शेती कापणे. 'मुसबिहीन' म्हणजे सकाळ होतांच, फळे उतारून घेऊं आणि पिके कापून घेऊ.

९) काही म्हणतात, रात्रीतूनच त्याला आग लागून गेली, काही म्हणतात ह.जिब्रईल عليه السلام नी येऊन त्यांचा विध्वंस करून टाकला.

१०) म्हणजे ज्याप्रमाणे शेती कापल्या गेल्यानंतर वाळून जाते. अशाच प्रकारे सर्व बाग विध्वंस्त होऊन गेला. काहींनी भाषांतर केले, काळ्या रात्री सारखा होऊन गेला. म्हणजे जळून.

११) म्हणजे बागेकडे जाण्यासाठी एक तर सकाळी सकाळीच निघाले, दुसरे हळूहळू गोष्ट करीत गेले की, कोणांस त्यांचे जाणे ठाऊक न व्हावे.

१२) म्हणजे ते एक दुसऱ्याला म्हणत राहिले की, आज कोणी बागेत येऊन आमच्याजवळ काही मागू नये. ज्याप्रमाणे आमच्या बापाच्या काळांत येत असत आणि आपला वाटा घेऊन जात असत.

१३) 'हरदिन्' चा एक अर्थ सामर्थ्य व सक्तीचा केला गेला आहे. ज्याला मृत भाषांतरकाराने 'लवकर लवकर' असे केले आहे. काहींनी राग आणि द्वेषाचे केले आहे. म्हणजे गोर गरीबांवर राग व प्रकोप दाखवित, किंवा त्यांचा द्वेष करत. 'कादरीन' म्हणजे त्यांनी आपल्या मामल्याचा अंदाज करून घेतला. म्हणजे आपल्या कल्पनेत त्यांनी आपल्या बागेवर वर्चस्व करून घेतले किंवा अर्थ आहे त्यांनी गोरगरीबांवर मर्यादा घालून दिली.

فَلَمَّا رَاَوْهَا قَالُوْٓا اِنَّا لَضَاۤلُّوْنَ ۝٢٦
जेव्हा त्यांनी बागेला पाहिले, (१) तेव्हा म्हणू लागले, खचित्‌च आम्ही वाट चूकून (२) गेलो ㉖

بَلْ نَحْنُ مَحْرُوْمُوْنَ ۝٢٧
नाही नाही, किंबहुना आमचे नशिबच फुटून गेले. (३) ㉗

قَالَ اَوْسَطُهُمْ اَلَمْ اَقُلْ لَّكُمْ لَوْلَا تُسَبِّحُوْنَ ۝٢٨
यांच्यात जो उत्तम मनुष्य होता, तो म्हणाला काय मी तुम्हांस सांगितले नव्हते की, तुम्ही अल्लाहचे पावित्र्य का वर्णन करीत नाही? (४) ㉘

قَالُوْا سُبْحٰنَ رَبِّنَآ اِنَّا كُنَّا ظٰلِمِيْنَ ۝٢٩
तर सर्व म्हणू लागले आमचा पालनकर्ता पवित्र आहे; निःसंशय आम्हीच जालीम होतो. (५) ㉙

فَاَقْبَلَ بَعْضُهُمْ عَلٰى بَعْضٍ يَّتَلَاوَمُوْنَ ۝٣٠
मग ते एक दुसऱ्याकडे वळून परस्पर दोष देऊ लागले. ㉚

قَالُوْا يٰوَيْلَنَآ اِنَّا كُنَّا طٰغِيْنَ ۝٣١
म्हणू लागले, खेद आहे! नक्कीच आम्ही शिरजोर होतो ㉛

عَسٰى رَبُّنَآ اَنْ يُّبْدِلَنَا خَيْرًا مِّنْهَآ اِنَّآ اِلٰى رَبِّنَا رٰغِبُوْنَ ۝٣٢
जवळ आहे की आमच्या पालनकर्त्याने आम्हास याच्यापेक्षा उत्तम बदला देऊन द्यावा. आम्ही तर आता (६) आपल्या पालनकर्त्याकडे आस्थापूर्वक वळलो आहोत. ㉜

كَذٰلِكَ الْعَذَابُ ۭ وَلَعَذَابُ الْاٰخِرَةِ اَكْبَرُ ۘ لَوْ كَانُوْا يَعْلَمُوْنَ ۝٣٣
अशीच आपत्ती येत असते; (७) आणि परलोकाची शिक्षा फार मोठी आहे. अरेरे! कदाचित्‌ ते समजते. (८) ㉝

اِنَّ لِلْمُتَّقِيْنَ عِنْدَ رَبِّهِمْ جَنّٰتِ النَّعِيْمِ ۝٣٤
अल्लाहला भिऊन वागणाऱ्यांसाठी, त्यांच्या पालनकर्त्याजवळ देणग्यांवाले बाग आहेत. ㉞

اَفَنَجْعَلُ الْمُسْلِمِيْنَ كَالْمُجْرِمِيْنَ ۝٣٥
काय आम्ही मुसलमानांना गुन्हेगारांसारखे करून टाकू? (९) ㉟

مَا لَكُمْ ۣ كَيْفَ تَحْكُمُوْنَ ۝٣٦
तुम्हास काय झाले? कसे फैसले करत आहात? ㊱

१) म्हणजे बागेच्या जागेला राखेचा ढीग किंवा त्याला नष्ट झालेले पाहिले.
२) म्हणजे पहिल्या प्रथम तर एक दुसऱ्याला सांगितले.
३) मग जेव्हा निरीक्षण केले, तेव्हा त्यांच्या लक्षात आले की हा आपत्तीत सापडलेला नष्ट झालेला बाग, आमचाच आहे. ज्याला अल्लाहने आमच्या कर्मगतीच्या शिक्षेत असा करून टाकला आहे आणि खरोखर हे आमचे दुर्दैव आहे.
४) काहींनी पावित्र्य वर्णनाने अभिप्रेत येथे 'इन्शा अल्लाह' म्हणणे घेतले आहे.
५) आणि आता त्यांना जाणीव झाली की, आम्ही आपल्या बापाच्या कर्मगती विरुद्ध, पाऊल उचलून चूक केली आहे. ज्याची शिक्षा अल्लाहने आम्हास दिली आहे याच्याने हे पण ठाऊक झाले की, गुन्ह्याचा इरादा आणि त्याच्यासाठी सुरवातीची पाऊले उचलणे सुद्धा गुन्हा करण्यासारखाच अपराध आहे. ज्यावर पकड होऊ शकते. फक्त तो इरादा माफ आहे, जो वसवश्यांच्या मर्यादेपर्यंतच राहतो.
६) असे म्हणतात की, त्यांनी आपसांत पक्के ठरविले की, आता जर अल्लाहने आम्हांस धनसंपत्ती दिली, तर इच्यातून आपल्या बापाप्रमाणे गोरगरीब मोहताजांचा हक्क अदा करू म्हणून पश्चात्ताप आणि तौबासह आपल्या पालनकर्त्याशी आशा बाळगल्या.
७) म्हणजे अल्लाहच्या हुकुमाच्या विरुद्ध आणि अल्लाहने दिलेल्या संपत्तीत कंजुषी करणाऱ्यांना आम्ही जगांत अशीच शिक्षा देत असतो. (जर आमच्या मर्जीचा असा तगादा असेल.)
८) परंतु खेद आहे, ते या वास्तविक गोष्टीला समजत नाही. म्हणूनच पर्वा करीत नाही.
९) मक्केचे मुशरिक म्हणत असत जर कयामत झालीच तर तेथे सुद्धा आम्ही मुसलमानांपेक्षा उत्तमच असू. जसे जगांत आम्ही मुसलमानांपेक्षा जास्त सुख संपन्न आहोत. अल्लाहने यांच्या उत्तरांत फर्माविले, हे कसे काय शक्य आहे की आम्ही मुसलमान म्हणजे आमच्या आज्ञाधारकांना अपराधी म्हणजे आज्ञाभंजकाप्रमाणे करून देऊ? अर्थ आहे की, अल्लाहतआला न्यायाच्या विरुद्ध उभयतांना समान करून टाकेन. हे शक्य नाही

اَمْ لَكُمْ كِتٰبٌ فِيْهِ تَدْرُسُوْنَ ۝٣٧

**काय तुमच्याजवळ कोणी पुस्तक आहे, [१] ज्याला तुम्ही वांचत असतात? (३७)**

اِنَّ لَكُمْ فِيْهِ لَمَا تَخَيَّرُوْنَ ۝٣٨

**की याच्यांत तुमच्या मनमान्या गोष्टी असाव्यात? (३८)**

اَمْ لَكُمْ اَيْمَانٌ عَلَيْنَا بَالِغَةٌ اِلٰى يَوْمِ الْقِيٰمَةِ ۙ اِنَّ لَكُمْ لَمَا تَحْكُمُوْنَ ۝٣٩

**का तुमच्याशी आम्ही अशा शपथा वाहिल्या आहेत? ज्या कयामतपर्यंत बाकी राहतील की, तुमच्याकरीता ते सर्व आहे, जे तुम्ही आपल्याकरीता निश्चित करून घ्याल [२] (३९)**

سَلْهُمْ اَيُّهُمْ بِذٰلِكَ زَعِيْمٌ ۝٤٠

**यांना विचारा की यांच्यातून कोण या गोष्टीला जबाबदार (आणि दावेदार) आहे? [३] (४०)**

اَمْ لَهُمْ شُرَكَآءُ ۚ فَلْيَاْتُوْا بِشُرَكَآئِهِمْ اِنْ كَانُوْا صٰدِقِيْنَ ۝٤١

**काय त्यांचे कोणी सरकतदार आहेत? तर त्यांना पाहिजे की आप आपल्या सरकतदारांना त्यांनी घेऊन यावे जर हे खरे आहेत. [४] (४१)**

يَوْمَ يُكْشَفُ عَنْ سَاقٍ وَّيُدْعَوْنَ اِلَى السُّجُوْدِ فَلَا يَسْتَطِيْعُوْنَ ۝٤٢

**ज्या दिवशी पोटरी उघडून दिली जाईल आणि (लोक) सजद्यासाठी बोलाविले जातील. तर हे (सजदा) करूशकणार नाहीत [५] (४२)**

خَاشِعَةً اَبْصَارُهُمْ تَرْهَقُهُمْ ذِلَّةٌ ۭ وَقَدْ كَانُوْا يُدْعَوْنَ اِلَى السُّجُوْدِ وَهُمْ سٰلِمُوْنَ ۝٤٣

**(त्यांच्या) नजरा खाली झुकलेल्या असतील; आणि त्यांच्यावर हीनता पसरलेली असेल; [६] वास्तविक हे सजद्याकरीता, (त्यावेळी) पण बोलाविले जात असत, जेव्हा की ते भले चंगे होते. [७] (४३)**

فَذَرْنِيْ وَمَنْ يُّكَذِّبُ بِهٰذَا الْحَدِيْثِ ۭ سَنَسْتَدْرِجُهُمْ مِّنْ حَيْثُ لَا يَعْلَمُوْنَ ۝٤٤

**तर तू मला आणि या वाणीला खोटे ठरवणाऱ्याला सोडून दे! [८] आम्ही त्यांना अशा प्रकारे हळूहळू ओढून नेऊ की, त्यांना ठाऊक पण होणार नाही. [९] (४४)**

وَاُمْلِيْ لَهُمْ ۭ اِنَّ كَيْدِيْ مَتِيْنٌ ۝٤٥

**आणि मी त्यांना ढील देईल, माझा डाव फार पक्का (डाव) आहे. [१०] (४५)**

اَمْ تَسْـَٔلُهُمْ اَجْرًا فَهُمْ مِّنْ مَّغْرَمٍ مُّثْقَلُوْنَ ۝٤٦

**काय तू त्यांच्यापासून काही वेतन मागत आहेस की हे त्याच्या भुर्दंडाने दबून जात आहेत? [११] (४६)**

اَمْ عِنْدَهُمُ الْغَيْبُ فَهُمْ يَكْتُبُوْنَ ۝٤٧

**किंवा काय यांच्याजवळ अदृष्टांचे काही ज्ञान आहे, ज्याला ते लिहून घेत असावे? [१२] (४७)**

فَاصْبِرْ لِحُكْمِ رَبِّكَ وَلَا تَكُنْ كَصَاحِبِ الْحُوْتِ ۘ اِذْ نَادٰى وَهُوَ مَكْظُوْمٌ ۝٤٨

**तर तू आपल्या पालनकर्त्याच्या हुकुमाची मुकाट्याने वाट पहात बस! [१३] आणि मासेवाल्या सारखा होऊन जाऊ नकोस. जेव्हा [१४] की त्याने दु:खाच्या स्थितीत प्रार्थना केली. [१५] (४८)**

لَوْلَآ اَنْ تَدٰرَكَهٗ نِعْمَةٌ مِّنْ رَّبِّهٖ لَنُبِذَ بِالْعَرَاۗءِ وَهُوَ مَذْمُوْمٌ ۝٤٩

**जर त्याच्या पालनकर्त्याचे उपकार झाले नसते तर तो खचित्‌च वाईट स्थितीत उघड्या जमिनीवर फेकून दिला गेला असता. [१६] (४९)**

فَاجْتَبٰهُ رَبُّهٗ فَجَعَلَهٗ مِنَ الصّٰلِحِيْنَ ۝٥٠

**त्याला त्याच्या पालनकर्त्याने पुन्हा निवडून [१७] घेतले आणि त्याला पुण्यशील सेवकांत शामील करून दिले. [१८] (५०)**

१) ज्यांत ही गोष्ट लिहलेली असावी, ज्याचा तुम्ही दावा करीत आहांत की, तेथे सुद्धा तुमच्याकरीता ते काही असेल, ज्याला तुम्ही पसंत करत आहात?

२) किंवा आम्ही तुमच्याशी पक्के वचन घेऊन ठेवले आहे, जे कयामतपर्यंत बाकी राहणार आहे की, तुमच्यासाठी तेच सर्व काही राहील. ज्याचा तुम्ही आपल्या बाबतीत फैसला कराल.

३) की ते कयामतच्या दिवशी त्यांच्या करीता तोच फैसला करवतील, जो अल्लाहतआला मुसलमानांसाठी करील.

४) किंवा ज्यांना त्यांनी सरकतदार ठरवून ठेवले आहे, ते त्यांची मदत करून त्यांना चांगले ठिकाण मिळवून देतील?

जर त्यांचे सरकतदार असे आहेत, तर त्यांना समोर आणावे की, त्यांची सत्त्यता जाहीर होऊन जावी.
५) काहींनी 'कशफे साक' ने अभिप्रेत कयामतचे काठिण्य आणि तिची भयानकता घेतली आहे. परंतु एका सहीह हदीसमध्ये याचा तपशील अशाप्रकारे सांगण्यात आला आहे की, कयामतच्या दिवशी अल्लाहतआला आपली पोटरी उघडेल (जसे की, त्याच्या शान प्रमाणे आहे) तेव्हा प्रत्येक ईमानवाला पुरुष आणि ईमानवाली स्त्री, त्याच्यासमोर सजद्यांत पडून जातील. तथापि ते लोक बाकी राहून जातील, जे देखावा आणि प्रसिद्धीसाठी सजदे करीत होते, ते सजदा करू इच्छितील परंतु त्यांच्या पाठीतील हाडांचे मणके पाटीप्रमाणे एक हाड बनून जातील. ज्यामुळे त्यांना वाकणे अशक्य होऊन जाईल. (स.बुखारी तफसीर सू.नून आणि सू. अल कलम) अल्लाहतआलाची पोटरी कशी असेल? तिला तो कशाप्रकारे उघडेल? या अवस्थेला आम्ही समजूशकत नाही आणि सांगू शकत नाही. म्हणून ज्याप्रमाणे आम्ही कुठल्याही उपमेशिवाय त्याचे डोळे, कान, हात वगैरे वर ईमान ठेवतो. तशाचप्रकारे पोटरीचा उल्लेख सुद्धा कुरआन आणि हदीसमध्ये आहे ज्यावर कुठल्याही कांआणि कसे शिवाय, ईमान ठेवणे आवश्यक आहे. हीच पूर्वीच्या पुण्यशील आणि हदीसवाल्यांची पद्धत (मसलक) आहे.
६) म्हणजे जगाच्या उलट यांचा मामला असेल. जगांत गर्व आणि अहंकारामुळे यांच्या माना ताठ होत्या.
७) म्हणजे तंदुरुस्त आणि ताजेतवाने होते. अल्लाहच्या उपासनेत कुठलीही गोष्ट त्यांना आडवी येत नव्हती. परंतु जगांत ते अल्लाहच्या उपासनेपासून दूर राहिले.
८) म्हणजे मीच त्यांच्याशी निपटून घेईल. तू त्यांची काळजी करू नकोस.
९) हा तोच ढील देण्याचा उल्लेख आहे. जो कुरआनांत कित्येक ठिकाणी सांगण्यांत आला आहे. आणि हदीसमध्ये सुद्धा खुलासा आहे की, आज्ञाभंजन असून सुद्धा, ऐहिक धनदौलत आणि साज सरंजामाची विपुलता, अल्लाहची कृपा नाही. अल्लाहच्या ढील देण्याच्या कायद्याचा परिणाम आहे. मग जेव्हा तो पकड करण्यावर येतो, तेव्हा कोणी वांचविणारा असत नाही.
१०) ही मागील विषयाचीच ताकीद आहे. 'कयद्' गुप्त युक्ती आणि डावाला म्हणतात. चांगल्याच्या उद्देशाने असेल तर यांच्यात काही वाईट नाही. त्याला उर्दू भाषेचा 'कय्द' समजण्यात येऊ नये; ज्यांत निंदेचा भावार्थ असतो.
११) हे संबोधन नबी ﷺ ला आहे, परंतु कान उघाडणी त्यांची केली जात आहे, जे आपल्यावर ईमान आणत नव्हते.
१२) म्हणजे काय अदृष्टाचे ज्ञान त्यांच्याजवळ आहे. 'लौहे महफूज' यांच्या कब्जात आहे की, यांच्यातून जी गोष्ट इच्छितात, नोंद करून घेतात (तेथून लिहून घेतात) म्हणून ते तुझे आज्ञापालन अंगीकारण्याला आणि तुझ्यावर ईमान आणण्याला आवश्यक समजत नाही. याचे उत्तर हे आहे की नाही ! असे नाही !! म्हणून पुढे सांगितले.
१३) म्हणजे जर गोष्ट अशी नाही. तर हे पैगंबरा! तू पैगंबरीची कर्तव्ये पार पाडीत रहा ! आणि खोटे ठरवणाऱ्यांच्या बाबतीत आल्लाहच्या फैसल्याची वाट पहात रहा!
१४) ज्यांनी आपल्या लोकांच्या खोटे ठरवण्याच्या चालीला ओळखून घाईने काम घेतले आणि आपल्या पालनकर्त्याच्या निर्णयाशिवायच, स्वत:च आपल्या लोकांना सोडून चालले गेले.
१५) ज्याच्या परिणामांत त्यांना माशाच्या पोटांत, जेव्हा की ते फारच दु:खी झाले होते, आपल्या पालनकर्त्याला मदतीसाठी बोलवावे लागेल. जसा की तपशील पूर्वी येऊन चुकला.
१६) आणि जर अल्लाहतआला त्यांना तौबा आणि विनवणी करण्याची सुबुद्धी न देता आणि त्यांची प्रार्थना मान्य न करतां, तर त्यांना समुद्राच्या किनाऱ्याऐवजी, जेथे त्यांच्या सांवल्या आणि खाद्यान्नासाठी बेलवाला वृक्ष उगवून दिला; कोण्या खडकाळ जमिनीत फेकून दिला गेला असता आणि अल्लाहजवळ त्यांची अवस्था पण निंदणीय असती. जेव्हा की, प्रार्थना मान्य झाल्यानंतर ते प्रशंसनीय झालेत. म्हणूनच पुढे सांगितले.
१७) याचा अर्थ आहे की, त्यांना तंदुरुस्त आणि ताजे तवाने करून दिल्यानंतर, दुसऱ्यांदा पैगंबरी बहाल करून त्यांना त्यांच्या लोकांकडे पाठवून दिले. जसे की, सू.साफ्फात – १४६ ने पण स्पष्ट आहे.
१८) म्हणूनच रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, ''कोण्या मनुष्याने हे न म्हणावे की, मी ''यूनुस बिन मत्ता हून उत्तम आहे.'' (स.मुस्लिम)

وَإِنْ يَكَادُ الَّذِينَ كَفَرُوا لَيُزْلِقُونَكَ بِأَبْصَارِهِمْ لَمَّا سَمِعُوا الذِّكْرَ وَيَقُولُونَ إِنَّهُ لَمَجْنُونٌ ۝٥١

आणि जवळच आहे की काफिर आपल्या तीव्र नजरेने, आपल्यास भटकवून द्यावे, [१] जेव्हा कधी ते कुरआन ऐकतात, आणि म्हणून टाकतात की, हा तर खचित्‌च वेडा आहे. [२] ५१

وَمَا هُوَ إِلَّا ذِكْرٌ لِّلْعٰلَمِيْنَ ۝٥٢

वास्तविक पाहता हे (कुरआन) तर, सकल जगाच्या लोकांसाठी निव्वळ बोधच [३] आहे. ५२



سُورَةُ الْحَاقَّةِ مَكِّيَّةٌ (٦٩) — آياتها ٥٢ — ركوعاتها ٢

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

(६९) सू. हाक्क:

महावाक्ये ५२ — रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اَلْحَاقَّةُ ۝١

खचितच घडून येणारी [४] १

مَا الْحَاقَّةُ ۝٢

खचितच घडून येणारी [५] काय आहे २

وَمَا أَدْرٰىكَ مَا الْحَاقَّةُ ۝٣

आणि तुला काय ठाऊक की ते घडून येणारे काय आहे? [६] ३

كَذَّبَتْ ثَمُوْدُ وَعَادٌۢ بِالْقَارِعَةِ ۝٤

या हळहळवून टाकणाऱ्या (संकटा) ला 'समूद' आणि 'आद' ने खोटे म्हटले होते. [७] ४

فَأَمَّا ثَمُوْدُ فَأُهْلِكُوْا بِالطَّاغِيَةِ ۝٥

(ज्याच्या परिणामांत) 'समूद' तर अति भयानक (आणि उंच) गर्जनेने नष्ट केले गेले. [८] ५

१) म्हणजे जर तुला अल्लाहची मदत आणि त्याचे संरक्षण नसते तर तू या काफिरांच्या द्वेषपूर्ण नजरेला बळी पडला असतांस; म्हणजे त्यांची नजर तुला लागून गेली असती. इमाम इब्ने कसीर ने याचा हाच भावार्थ सांगितला आहे. ते आणखी लिहितात, हे या गोष्टीचे प्रमाण आहे की, नजर लागून जाणे आणि तिचा – अल्लाहच्या हुकूमाने परिणामकारक होणे, सत्य आहे. जसे की, अनेक हदीसींनी सिद्ध आहे. म्हणून हदीसींमध्ये वाईट नजर लागण्यापासून वाचणाऱ्याच्या दुआपण सांगण्यांत आल्या आहेत. आणि ही पण ताकीद करण्यांत आली आहे की, जेव्हा तुम्हांस कोठली वस्तू चांगली वाटेल तेव्हा 'माशाअ अल्लाह' किंवा 'बारकल्लाह्' म्हणत जा ! की तिला नजर न लागावी. अशाच प्रकारे कोणाची कोणाला नजर लागून जाईल तर फर्माविले त्याला 'गुसल्' करवून, त्याचे पाणी त्या माणसावर टाकण्यांत यावे, ज्याची याला नजर लागली आहे. (तपशिलाकरीता पहावे तफसीर इब्ने कसीर आणि हदीसची पुस्तके) काहींनी याचा हा अर्थ सांगितला आहे की, हे तुला पैगंबरीच्या कामापासून फिरवून देते.

२) म्हणजे द्वेष म्हणून सुद्धा, आणि या गरजेपोटी सुद्धा की लोकांनी या कुरआनापासून परिणाम घेऊ नये. किंबहुना त्यांनी यापासून दुरच रहावे. म्हणजे डोळ्यांनी सुद्धा हे काफिर नबी ﷺ ला नुकसान पोहोचविण्याचा प्रयत्न करीत आणि तोंडानी सुद्धा, आपणास इजा पोहचवित. आणि आपल्या मनाला व्यथित करीत.

३) जेव्हा खरी गोष्ट अशी आहे की, हे कुरआन जिन्नात आणि मनुष्याच्या सन्मार्ग दर्शनार्थ आले आहे; तर मग त्याला आणणारा आणि सांगणारा वेडा कसा काय होऊ शकतो?

४) हे कयामतच्या नांवातून एक नांव आहे. याच्यात अल्लाहचा हुकूम लागू होईल आणि स्वत: ही सुद्धा कुठल्याही प्रकारे घडूनच येणार आहे. म्हणू इला 'अल् हाक्क:' ने संबोधित केले.

५) हे शाब्दिक विचारणे आहे. परंतु याचा उद्देश्य कयामतशी महत्ता आणि भव्य शान वर्णन करणे आहे. म्हणूनच पुढे पुन्हा सांगितले.

६) म्हणजे कशाप्रकारे तू या पूर्ण हकीकतीशी वाकब होशील? अर्थ याच्या ज्ञानाचे नसणे आहे. जणू तुला याचे ज्ञान नाही. कारण की तू अजून तिला पाहिले नाही. आणि न तिची भयानकता तू अनुभवली आहेस; जणूंकी सृष्टीच्या ज्ञानाच्या पलीकडे आहे. (फत्हूल कदीर)

७) याच्यात कयामतला हळहळून टाकणारी म्हटले आहे. यासाठी की, ही आपल्या भयानकतेने लोकांना जागे करून देईल.

८) 'तागीया' असा आवाज जो मर्यादेच्या पलीकडे जाणारा असावा. म्हणजे फारच भयानक आणि मोठ्या गर्जनेने समूदच्या लोकांना नष्ट केले गेले जसे की, पूर्वी अनेक ठिकाणी येऊन चुकले.

आणि 'आद' एका झपाट्याच्या जोरदार वावटळीने उध्वस्त केले गेले[१] ⑥
وَأَمَّا عَادٌ فَأُهْلِكُوا بِرِيحٍ صَرْصَرٍ عَاتِيَةٍ ﴿٦﴾

जी यांच्यावर बरोबर सतत सात रात्री आणि आठ दिवस, (अल्लाहच्या) हुकूमाने चालत राहिली; [२] तर तू पाहशील की, हे लोक जमिनीवर अशाप्रकारे पडले होते, जसे खजुरीचे पोकळ खोड असावेत. [३] ⑦
سَخَّرَهَا عَلَيْهِمْ سَبْعَ لَيَالٍ وَثَمَانِيَةَ أَيَّامٍ حُسُومًا فَتَرَى الْقَوْمَ فِيهَا صَرْعَىٰ كَأَنَّهُمْ أَعْجَازُ نَخْلٍ خَاوِيَةٍ ﴿٧﴾

काय त्यांच्यातून कोणी सुद्धा तुला बाकी राहिलेला दिसून येतो? ⑧
فَهَلْ تَرَىٰ لَهُمْ مِنْ بَاقِيَةٍ ﴿٨﴾

फिरऔन आणि त्याच्या पूर्वीचे लोक, आणि ज्यांच्या वस्त्या उलटून टाकण्यांत आल्या. [४] त्यांनी सुद्धा पापे केली. ⑨
وَجَاءَ فِرْعَوْنُ وَمَنْ قَبْلَهُ وَالْمُؤْتَفِكَاتُ بِالْخَاطِئَةِ ﴿٩﴾

आणि आपल्या पालनकर्त्याच्या पैगंबराचे आज्ञाभंजन केले. (सरशेवटी) अल्लाहने त्यांना सुद्धा जबरदस्त पकडीत घेऊन घेतले[५] ⑩
فَعَصَوْا رَسُولَ رَبِّهِمْ فَأَخَذَهُمْ أَخْذَةً رَابِيَةً ﴿١٠﴾

जेव्हा पाण्याचे तुफान उसळले, तेव्हा [६] आम्ही तुम्हास गलबतात स्वार करून घेतले होते. [७] ⑪
إِنَّا لَمَّا طَغَا الْمَاءُ حَمَلْنَاكُمْ فِي الْجَارِيَةِ ﴿١١﴾

कारण की त्याला तुमच्यासाठी (एक) बोध आणि यादगारी बनवून ठेवावी. [८] (आणि कारण की) आठवण ठेवणाऱ्या कानांनी त्याची आठवण ठेवावी. [९] ⑫
لِنَجْعَلَهَا لَكُمْ تَذْكِرَةً وَتَعِيَهَا أُذُنٌ وَاعِيَةٌ ﴿١٢﴾

तर जेव्हा तुतारी मध्ये एक फुंक मारली जाईल. [१०] ⑬
فَإِذَا نُفِخَ فِي الصُّورِ نَفْخَةٌ وَاحِدَةٌ ﴿١٣﴾

आणि जमीन आणि पर्वत उचलून घेतले जातील [११] आणि एकाच फटक्या सरशी त्याचे कण कण करून टाकले जातील. ⑭
وَحُمِلَتِ الْأَرْضُ وَالْجِبَالُ فَدُكَّتَا دَكَّةً وَاحِدَةً ﴿١٤﴾

त्या दिवशी खचित घडून येणारी (कयामत) घडून येईल. ⑮
فَيَوْمَئِذٍ وَقَعَتِ الْوَاقِعَةُ ﴿١٥﴾

१) 'सर्‌सर' सोसाट्याची वावटळ; 'आतिया' शिरजोर. कोणाच्या काबुत न येणारी म्हणजे फारच सोसाट्याची वावटळ आणि बेकाबू वारा, ज्याच्याने ह.हूद عليه السلام चे लोक 'आद' ला नष्ट करण्यांत आले.

२) 'हसम' चा अर्थ कापणे आणि वेगवेगळे करून ढेणेचा आहे आणि काहींनी 'हसुमन्' चा अर्थ लागोपाठ केला आहे.

३) याच्याने त्यांच्या उंच अंगकाठीकडे सुद्धा इशारा आहे. 'खाविय:' पोकळ निष्प्राण शरीराला पोकळ खोडाची उपमा दिली आहे.

४) याच्याने 'लूत' चे लोक अभिप्रेत आहेत.

५) 'राबिय:' ज्याचा अर्थ अधिकतेचा आहे. म्हणजे त्यांची अशी पकड केली, जी दुसऱ्या लोकांच्या पकडीपासून ती अधिक कठीण होती. जणूं 'अखजत: राबिय:' चा भावार्थ झाला. फारच कठीण पकड.

६) म्हणजे पाणी अथांग आणि उंचीच्या मर्यादापार करून गेले, म्हणजे फारच वाढून गेले.

७) 'कुम्' ने संबोधित, पैगंबरकालीन लोक आहेत. अर्थ हा आहे की तुम्ही ज्या वाडवडीलांचे वंशज आहात, आम्ही त्यांना गलबतावर स्वार करून, उसळलेल्या पाण्यातून वांचवून घेतले. 'अल् जारिय:' ने अभिप्रेत नूह عليه السلام ची नौका आहे.

८) म्हणजे हे कृत्य की, काफिरांना पाण्यांत बुडवून टाकले. आणि ईमानवाल्यांना गलबतात स्वार करून वांचवून घेतले; तुमच्याकरीता त्याला एक बोध आणि धडा बनवून द्यावा कारण की तुम्ही यापासून बोध घ्यावा आणि अल्लाहच्या आज्ञाभंजनापासून वांचावे.

९) म्हणजे ऐकणाऱ्यांनी त्याला ऐकून, लक्षांत ठेवावे आणि त्यांनी पण याच्या पासून बोध घ्यावा.

१०) खोटे ठरविणाऱ्यांचा परिणाम सांगिल्यानंतर, आता दाखविण्यांत येत आहे की, ही 'अल्‌हाक्क:' कशाप्रकारे घडून येईल. इसराफीलच्या एका फुंकनेच ही घडून येईल.

११) म्हणजे आपल्या जागेवरून उचलून घेतले जातील आणि अल्लाहच्या सामर्थ्याने, आपल्या ठिकाणांवरून त्यांना उपटून घेण्यात येईल.

وَانْشَقَّتِ السَّمَآءُ فَهِيَ يَوْمَئِذٍ وَّاهِيَةٌ ۝١٦

**आणि आकाश फाटून पडेल आणि त्या दिवशी बिल्कुल पोचट होऊन जाईल.**(१) ⑯

وَّالْمَلَكُ عَلٰٓى اَرْجَآئِهَا ۗ وَيَحْمِلُ عَرْشَ رَبِّكَ فَوْقَهُمْ يَوْمَئِذٍ ثَمٰنِيَةٌ ۝١٧

**आणि त्याच्या किनाऱ्यावर दूत असतील;**(२) **आणि तुझ्या पालनकर्त्याचे सिंहासन त्या दिवशी आठ (देवदूत) आपल्यावर उचलून धरतील.**(३) ⑰

يَوْمَئِذٍ تُعْرَضُوْنَ لَا تَخْفٰى مِنْكُمْ خَافِيَةٌ ۝١٨

**त्या दिवशी तुम्ही सर्व (अल्लाहच्या) समोर रुजू केले जाल;**(४) **तुमचे कोणतेच गुढ गुप्त राहणार नाही.** ⑱

فَاَمَّا مَنْ اُوْتِيَ كِتٰبَهٗ بِيَمِيْنِهٖ ۙ فَيَقُوْلُ هَآؤُمُ اقْرَءُوْا كِتٰبِيَهْ ۝١٩

**तर ज्याचे कर्मपत्र त्याच्या उजव्या**(५) **हातांत दिले जाईल, तर तो म्हणू लागेल, घ्या माझे कर्मपत्र तर वांचा!**(६) ⑲

اِنِّيْ ظَنَنْتُ اَنِّيْ مُلٰقٍ حِسَابِيَهْ ۝٢٠

**मला तर पूर्ण खात्री होती की, मला माझा हिशोब मिळणार आहे.**(७) ⑳

فَهُوَ فِيْ عِيْشَةٍ رَّاضِيَةٍ ۝٢١

**तर तो एका सुखावह जीवनांत असेल.** ㉑

فِيْ جَنَّةٍ عَالِيَةٍ ۝٢٢

**उंच आणि परत्पर स्वर्गामध्ये**(८) ㉒

قُطُوْفُهَا دَانِيَةٌ ۝٢٣

**ज्यांची फळे लोंबकळलेली असतील;**(९) ㉓

१) म्हणजे त्यांच्यात काही शक्ती आणि मजबुती राहणार नाही. जी वस्तू फाटून तुकडे तुकडे होऊन जाईल तिच्यात मजबुती कशी काय राहणार?

२) म्हणजे आकाश तर तुकडे तुकडे होऊन जाईल; मग आकाशातील सृष्टी, देवदूत कोठे असतील ? सांगितले, ते आकाशाच्या किनाऱ्यावर असतील, याचा एक अर्थ तर असा होऊ शकतो की, देवदूत आकाश फाटण्यापूर्वी अल्लाहच्या हुकुमाने जमिनीवर येऊन लागतील तर जणू देवदूत पृथ्वीच्या किनाऱ्यावर असतील. किंवा हा अर्थ होऊ शकतो की आकाश तुटण्या फुटण्याचा बळी बनून वेगवेगळ्या तुकड्यांत होऊन जाईल. तर त्या तुकड्यावर जे जमिनीच्या जवळ असतील, आणि स्वत: ते शाबूत असतील, त्यांच्यावर असतील (फत्हूल कदीर)

३) म्हणजे या विशेष देवदूतांनी अल्लाहच्या सिंहासनाला आपल्या डोक्यावर उचलले असेल. हे पण शक्य आहे की, या सिंहासनाने अभिप्रेत ते सिंहासन असावे जे फैसल्यासाठी जमिनीवर ठेवले जाईल, ज्यावर अल्लाहतआला विराजमान होईल. (इब्ने कसीर)

४) ही पेशी यासाठी होणार नाही की, ज्यांना अल्लाह जाणत नाही, त्यांना जाणून घ्यावे तो तर सर्वांनाच जाणतो ही पेशी स्वत: मनुष्यावर हुज्जत पूर्ण करण्यासाठी होईल. नाही तर अल्लाहपासून कोणाची कोठलीही गोष्ट गुप्त नाही. जसे की पुढे पण सांगितले आहे.

५) जे याच्या भाग्यवंत होण्याचे, मुक्तीचे आणि साफल्याचे प्रमाणपत्र असेल.

६) म्हणजे तो अत्यानंदाने, प्रत्येकाला म्हणेल, घ्या! वांचून घ्या माझे कर्मपत्र ! जे मला मिळाले आहे. यासाठी की त्याला ठाऊक असेल की, त्यांत त्याचे पुण्यच पुण्य असेल. काही पापे असतील तर ती अल्लाहने क्षमा करून टाकली असतील किंवा त्या पापांना सुद्धा पुण्यात बदलून दिले गेले असेल, जसे की, अल्लाहतआला ईमानवाल्यांबरोबर दया आणि कृपेची ही वेगवेगळी स्वरुपे अंगीकारील.

७) म्हणजे परलोकाच्या हिशोबावर माझा पूर्ण विश्वास होता.

८) स्वर्गात वेगवेगळे दर्जे असतील. प्रत्येक दर्जांत खूप मोठे अंतर असेल. जसे मुजाहिदीनच्या बाबतीत नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''स्वर्गात शंभर दर्जे आहेत. जे अल्लाहने त्याच्या मार्गात लढणाऱ्या मुजाहिदीनसाठी तयार केले आहेत. दोन दरवाज्यांच्या दर्म्यान, पृथ्वी आणि आकाशाएवढे अंतर असेल.'' (स.मुस्लीम,स.बुखारी)

९) म्हणजे बिल्कुल जवळ असतील म्हणजे जर कोणी निजून निजून सुद्धा तोडू इच्छील तरी शक्य होईल. 'कुतूफ' 'कतिफून' चे अनेकवचन आहे.निवडलेले किंवा तोडलेले अभिप्रेत फळे आहेत.

كُلُوا وَاشْرَبُوا هَنِيئًا بِمَا أَسْلَفْتُمْ فِي الْأَيَّامِ الْخَالِيَةِ ٢٤

(त्यांना सांगण्यात येईल) की मजेने खा (व) प्या; आपल्या कर्मांच्या बदल्यात जे तुम्ही मागील काळांत केलेत. [१] २४

وَأَمَّا مَنْ أُوتِيَ كِتَابَهُ بِشِمَالِهِ فَيَقُولُ يَا لَيْتَنِي لَمْ أُوتَ كِتَابِيَهْ ٢٥

परंतु ज्याला त्याचे (कर्म) पुस्तक डाव्या हातांत दिले जाईल, तो तर म्हणेल की, जर मला माझे पुस्तक दिलेच गेले नसते! [२] २५

وَلَمْ أَدْرِ مَا حِسَابِيَهْ ٢٦

आणि मी हिशोब जाणलाच नसता [३] की, तो काय आहे! २६

يَا لَيْتَهَا كَانَتِ الْقَاضِيَةَ ٢٧

हाय अफसोस ! की मृत्यूने माझा अंत करुन दिला असता [४] २७

مَا أَغْنَىٰ عَنِّي مَالِيَهْ ٢٨

माझ्या धनदौलतीने मला काही नफा दिला नाही. २८

هَلَكَ عَنِّي سُلْطَانِيَهْ ٢٩

मजपासून माझी सत्तापण जात राहिली [५] २९

خُذُوهُ فَغُلُّوهُ ٣٠

(हुकूम होईल) पकडून घ्या. मग याच्या गळ्यांत मानखोडा घाला ३०

ثُمَّ الْجَحِيمَ صَلُّوهُ ٣١

मग त्याला नरकाग्नीत टाकून द्या! [६] ३१

ثُمَّ فِي سِلْسِلَةٍ ذَرْعُهَا سَبْعُونَ ذِرَاعًا فَاسْلُكُوهُ ٣٢

मग त्याला अशा साखळीने जिची लांबी सत्तर गज असेल, जकडून द्या! [७] ३२

إِنَّهُ كَانَ لَا يُؤْمِنُ بِاللَّهِ الْعَظِيمِ ٣٣

नि:संशय हा महान अल्लाहवर विश्वास (ईमान) ठेवत नव्हता [८] ३३

وَلَا يَحُضُّ عَلَىٰ طَعَامِ الْمِسْكِينِ ٣٤

आणि गोरगरीबास खाऊ घालण्याचे उत्तेजन देत नव्हता. [९] ३४

فَلَيْسَ لَهُ الْيَوْمَ هَاهُنَا حَمِيمٌ ٣٥

तर आज याचा न कोणी मित्र आहे. ३५

وَلَا طَعَامٌ إِلَّا مِنْ غِسْلِينٍ ٣٦

आणि पुंवाशिवाय याला काही खावयास नाही. [१०] ३६

لَا يَأْكُلُهُ إِلَّا الْخَاطِئُونَ ٣٧

ज्याला पाप्याशिवाय कोणीच खात नाही. [११] ३७

فَلَا أُقْسِمُ بِمَا تُبْصِرُونَ ٣٨

तर मला शपथ आहे त्या वस्तुंची ज्यांना तुम्ही पाहता ३८

وَمَا لَا تُبْصِرُونَ ٣٩

आणि त्या वस्तुंची ज्यांना तुम्ही पाहत नाही [१२] ३९

إِنَّهُ لَقَوْلُ رَسُولٍ كَرِيمٍ ٤٠

नि:संशय हे कुरआन (एका) सन्माननीय पैगंबराची (आणलेली अल्लाहची) वाणी आहे. [१३] ४०

وَمَا هُوَ بِقَوْلِ شَاعِرٍ ۚ قَلِيلًا مَا تُؤْمِنُونَ ٤١

ही कोण्या कवीची वाणी नाही. [१४] (खेद आहे) तुम्ही फार कमी विश्वास ठेवतां ४१

وَلَا بِقَوْلِ كَاهِنٍ ۚ قَلِيلًا مَا تَذَكَّرُونَ ٤٢

न कोण्या भविष्य सांगणाऱ्याची वाणी आहे; [१५] (खेद आहे!) की, तुम्ही फारच कमी उपदेश ग्रहण करीता. [१६] ४२

تَنْزِيلٌ مِنْ رَبِّ الْعَالَمِينَ ٤٣

(हे तर) सकल जगाच्या पालनकर्त्याकडून अवतरीत झाले आहे. [१७] ४३

وَلَوْ تَقَوَّلَ عَلَيْنَا بَعْضَ الْأَقَاوِيلِ ٤٤

आणि जर हा आमच्यावर कुठलीही गोष्ट घडवून घेता. [१८] ४४

لَأَخَذْنَا مِنْهُ بِالْيَمِينِ ٤٥

तर अलबत्त आम्ही याचा उजवा हात धरून घेतो; [१९] ४५

ثُمَّ لَقَطَعْنَا مِنْهُ الْوَتِينَ ٤٦

मग त्याच्या हृदयाची शीर कापून टाकतो [२०] ४६

فَمَا مِنْكُمْ مِنْ أَحَدٍ عَنْهُ حَاجِزِينَ ٤٧

मग तुमच्यातून कोणी सुद्धा याच्यापासून (आम्हास) प्रतिबंध न करू शकता. [२१] ४७

१) म्हणजे जगांत चांगली कामे केली. हा स्वर्ग त्याचा मोबदला आहे.

२) कारण की कर्मपत्राचे डाव्या हातात मिळणे दुर्भाग्याचे चिन्ह असेल.

३) म्हणजे मला दाखविलेच गेले नसते; कारण की सर्व हिशेब त्याच्या विरुद्ध असेल.

४) म्हणजे मृत्यूच निर्णय करणारा झाला असता, आणि दुसऱ्यांदा जिवंत न केले गेले असते; की हा दुर्दैवी दिवस पहावा लागला नसता.

५) म्हणजे ज्याप्रमाणे धनदौलत माझ्या काही कामा आली नाही; पद मर्तबा आणि राज्य आणि सत्ता पण माझ्या काही कामा आले नाही आणि आज मी येथे एकटाच शिक्षा भोगावयांस मजबुर झालो आहे.

६) हा, अल्लाहतआला नरकाग्नीच्या दूतांना हुकूम देईल.

७) हा 'जराअ' (हात) ज्याचे येथे गज असे भाषांतर केले गेले आहे, कोणाचा हात असावा? आणि हा केवढा असावा? याचा खुलासा शक्य नाही. याच्याने इतके ठाऊक झाले की, सांखळीची लांबी सत्तर हात असेल.

८) ही चर्चित शिक्षेची सबब किंवा अपराध्याच्या अपराधाचे वर्णन आहे.

९) म्हणजे उपासना आणि आज्ञापालन मार्फत अल्लाहचा हक्क अदा करीत होता न ते हक्क अदा करीत होता जे सेवकांचे सेवकांवर असतात. जणू ईमानवाल्यांमध्ये ते सर्व काही असते की ते अल्लाहचे हक्क आणि सेवकांचे हक्क दोन्ही अदा करण्याची काळजी घेतात.

१०) काही म्हणतात की, हा नरकाग्नीमध्ये कोणी वृक्ष आहे. काही म्हणतात की, निवडूंगालाच येथे 'गिसलीन' म्हटले गेले आहे. आणि काही म्हणतात की, हे नर्कवासियांचा पू किंवा त्यांच्या शरीरातूंन निघणारे रक्त आणि दुर्गंधीयुक्त पाणी असेल. अआजनल्लाहु मिनहुं.

११) 'खातिऊन' ने अभिप्रेत नर्कवासीय आहेत. जे कुफ्र शिर्कमुळे, नरकाग्नीत दाखल होतील. यासाठी की हेच गुन्हे असे आहेत, जे आगीत दाखल होण्याला कारणीभूत आहेत.

१२) म्हणजे अल्लाहने निर्माण केलेल्या त्या वस्तूं, ज्या अल्लाहचे व्यक्तीत्व आणि त्याचे सामर्थ्य आणि शक्तीवर प्रामाण्य करतात; ज्यांना तुम्ही पाहतात किंवा पहात नाही; या सर्वांची शपथ आहे.

१३) सन्माननीय पैगंबराने अभिप्रेत ह.मुहम्मद रसूलुल्लाह ﷺ आहेत आणि म्हणण्याने अभिप्रेत कुरआनाचे पठण आहे. किंवा कौलने अभिप्रेत असे म्हणणे आहे जे कृपाळूंअल्लाहचा पैगंबर अल्लाहकडून तुम्हांस पोहचवितो. कारण की, कुरआन, पैगंबर किंवा जिब्रईल चे म्हणणे नाही. किंबहुना अल्लाहचे म्हणणे (कथन) आहे. जे त्याने देवदुतामार्फत पैगंबरावर अवतरीत केले आहे. मग पैगंबर त्याला लोकांपर्यंत पोहचवितो.

१४) जसे की तुम्ही समजतात आणि म्हणतात. कारण की हे, काव्यासारखे नाही आणि काव्य नाही. मग हे कोण्या कवीची वाणी कशी होऊ शकते?

१५) जेव्हा की कधी कधी तुम्ही हा दावा सुद्धा करतात; वास्तविक भविष्य सांगणे ही सुद्धा एक वेगळी गोष्ट आहे.

१६) 'किल्लत' दोन्ही ठिकाणी नसण्याच्या अर्थांत आहे. म्हणजे तुम्ही कुरआनावर बिल्कुल ईमान आणित नाही, तसेच त्याच्यापासून काही बोध घेत नाही.

१७) म्हणजे पैगंबराच्या मुखाने निघणारे हे म्हणणे, सकल जगाच्या पालनकर्त्याकडून अवतरीत झालेली वाणी आहे. त्याला तुम्ही कधी काव्य, कधी भविष्य कथन, म्हणून त्याला खोटे ठरवतात?

१८) म्हणजे आपल्याकडून घडवून आमच्याकडून आहे असे सांगितले असते, किंवा याच्यांत कमी जास्त केले असते, तर आम्ही लगेच त्याची पकड करतो, आणि त्याला ढिल न देतो; जसे की पुढील महावाक्यांत सांगितले.

१९) किंवा उजव्या हाताकडून त्याची पकड करतो. अशासाठी की, उजव्या हाताकडून पकडणे जास्त सक्त असते आणि अल्लाहचे तर दोन्ही हात उजवे आहेत. (जसे की हदीसमध्ये आहे)

२०) लक्षांत ठेवावे की, ही शिक्षा खास नबी ﷺ च्या संदर्भात सांगण्यांत आली आहे. ज्याचा उद्देश्य आपली सत्त्यता जाहीर करणे आहे. याच्यांत हे तत्त्व सांगण्यांत आले आहे की, जो पण पैगंबरीचा खोटा दावा करेल, तर खोटा दावा करणाऱ्याला आम्ही लगेच शिक्षा देऊ. तथापि याने कोण्या खोट्या पैगंबराला, यासाठी खरे ठरविले जाऊं शकत नाही की, या जगांत तो अल्लाहच्या पकडीपासून वांचून राहिला. घटनापण साक्ष आहेत की, निरनिराळ्या लोकांनी पैगंबरीचे खोटे दावे केले, अल्लाहने त्यांना ढील दिली. आणि ऐहिक पकडीपासून ते सर्वसाधारण सुरक्षितच राहिले. म्हणून जर याला तत्त्व म्हणून मान्य केले जाईल, तर निरनिराळ्या पैगंबरीच्या खोट्या दावेदारांना ''खरा पैगंबर'' मानावे लागेल.

२१) याच्याने ठाऊक झाले की, हजरत मुहम्मद रसूलुल्लाह ﷺ खरे पैगंबर आहेत, ज्यांना अल्लाहने शिक्षा दिली नाही. किंबहुना प्रमाणे व चमत्कार आणि आपले खास समर्थन आणि मदत त्यांना बहाल केली.

وَإِنَّهُۥ لَتَذْكِرَةٌ لِّلْمُتَّقِينَ ﴿٤٨﴾

खचित्‌च हे कुरआन (अल्लाहला) भिऊन वागणाऱ्यांसाठी एक बोध आहे.(१) ४८

وَإِنَّا لَنَعْلَمُ أَنَّ مِنكُم مُّكَذِّبِينَ ﴿٤٩﴾

आम्हांस चांगल्या प्रकारे ठाऊक आहे की, तुमच्यातून कित्येक यांस खोटे ठरवणारे सुद्धा आहेत. ४९

وَإِنَّهُۥ لَحَسْرَةٌ عَلَى ٱلْكَـٰفِرِينَ ﴿٥٠﴾

नि:संशय (हे खोटे ठरविणे) काफिरांसाठी खेदप्रद आहे. (२) ५०

وَإِنَّهُۥ لَحَقُّ ٱلْيَقِينِ ﴿٥١﴾

आणि यांत काही संशय नाही की, हे निश्चितच सत्य आहे. (३) ५१

ع ٢/١٥/٦ फَسَبِّحْ — 

فَسَبِّحْ بِٱسْمِ رَبِّكَ ٱلْعَظِيمِ ﴿٥٢﴾ ع ٢ ١٥ ٦

ऋ २ १५ ६ तर तू आपल्या महान पालनकर्त्याच्या पावित्र्याचे वर्णन कर. (४) ५२

(٧٠) سُورَةُ الْمَعَارِجِ مَكِّيَّةٌ (٧٩) — آياتها ٤٤ — ركوعاتها ٢

## (७०) सू. मआरिज

महावाक्ये ४४ — रुकूअ २

بِسْمِ ٱللَّهِ ٱلرَّحْمَـٰنِ ٱلرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

سَأَلَ سَآئِلٌۢ بِعَذَابٍ وَاقِعٍ ﴿١﴾

कोण्या एका मागणी करणाऱ्याने, (५) त्या शिक्षेची मागणी केली, जी होणारी आहे. १

لِّلْكَـٰفِرِينَ لَيْسَ لَهُۥ دَافِعٌ ﴿٢﴾

काफिरांवर जिला कोणी टाळणारा नाही. २

مِّنَ ٱللَّهِ ذِى ٱلْمَعَارِجِ ﴿٣﴾

त्या अल्लाहकडून जो पायऱ्यावाला आहे. (६) ३

تَعْرُجُ ٱلْمَلَـٰٓئِكَةُ وَٱلرُّوحُ إِلَيْهِ فِى يَوْمٍ كَانَ مِقْدَارُهُۥ خَمْسِينَ أَلْفَ سَنَةٍ ﴿٤﴾

ज्याच्याकडे देवदूत आणि रुह चढून जातात; (७) अशा एका दिवशी ज्याचा अंदाज पन्नास हजार वर्षांचा आहे. (८) ४

فَٱصْبِرْ صَبْرًا جَمِيلًا ﴿٥﴾

तर तू चांगल्या प्रकारे सहन कर ५

إِنَّهُمْ يَرَوْنَهُۥ بَعِيدًا ﴿٦﴾

नि:संशय हे त्या (शिक्षे) ला दूर समजत आहेत ६

وَنَرَىٰهُ قَرِيبًا ﴿٧﴾

आणि आम्ही तिला जवळच पहात आहोत(९) ७

يَوْمَ تَكُونُ ٱلسَّمَآءُ كَٱلْمُهْلِ ﴿٨﴾

ज्या दिवशी आकाश खाली बसलेल्या तेलासारखे होऊन जाईल. ८

وَتَكُونُ ٱلْجِبَالُ كَٱلْعِهْنِ ﴿٩﴾

आणि पर्वत रंगीत लोकरीसारखे होऊन जातील. (१०) ९

وَلَا يَسْـَٔلُ حَمِيمٌ حَمِيمًا ﴿١٠﴾

आणि कोणी मित्र कोण्या मित्राला विचारणार नाही. १०

يُبَصَّرُونَهُمْ ۚ يَوَدُّ ٱلْمُجْرِمُ لَوْ يَفْتَدِى مِنْ عَذَابِ يَوْمِئِذٍۭ بِبَنِيهِ ﴿١١﴾

(वास्तविक) ते एक दुसऱ्याला दाखवून दिले जातील, (११) आजच्या दिवशी गुन्हेगार लोक, शिक्षेच्या बदल्यांत, प्राणमूल्य म्हणून, आपल्या मुलांना ११

وَصَـٰحِبَتِهِۦ وَأَخِيهِ ﴿١٢﴾

आणि आपल्या पत्नींना आणि आपल्या भावाला, १२

وَفَصِيلَتِهِ ٱلَّتِى تُـْٔوِيهِ ﴿١٣﴾

आणि आपल्या कुटुंबाला जे त्याला आश्रय देत होते. १३

وَمَن فِى ٱلْأَرْضِ جَمِيعًا ثُمَّ يُنجِيهِ ﴿١٤﴾

आणि भूपृष्ठावरील सर्व लोकांना देऊ इच्छील की, त्याला (१२) मुक्ती मिळून जावी. १४

१) कारण की तेच यापासून फायदा उचलतात, नाही तर कुरआन तर सकल जगाच्या लोकांसाठी बोध घेण्यासाठी आले आहे.

२) म्हणजे कयामतच्या दिवशी यावर खेद करतील की अरेरे! आम्ही कुरआनाला खोटे म्हटले नसते तर किती बरे झाले असते!! किंवा हे स्वत:त्याच्यासाठी खेदाला कारणीभूत होईल. जेव्हा ते ईमानवाल्यांना कुरआनाचे प्रतिफल मिळतांना पाहतील.

३) म्हणजे कुरआनाचे अल्लाहकडून होणे बिल्कुल निश्चित आहे. याच्यांत शंकेला काहीच वाव नाही किंवा कयामतच्या बाबतीत जी बातमी दिली जात आहे, ती बिल्कुल सत्य आणि खरी आहे.

४) ज्याने कुरआन करीम सारखे महान पुस्तक अवतरीत केले.

५) असे म्हणतात की हा नजर बीन हारिस होता. किंवा अबुजहल होता. ज्याने म्हटले होते, ''हे अल्लाह! जर हे कुरआन खरोखर तुझ्याकडून आहे, तर आमच्यावर आकाशांतून दगडांचा वर्षाव कर!'' वगैरे (सू.अन्फाल-३२) म्हणून हा मनुष्य बद्रच्या युद्धांत मारला गेला. काही म्हणतात याच्याने अभिप्रेत रसूलुल्लाह ﷺ आहेत. ज्यांनी आपल्या समाजाच्या लोकांना शाप दिला होता. आणि याच्या परिणामांत मक्कावाल्यांवर दुष्काळ लादला गेला होता.

६) किंवा दर्जावाला, उच्चतेवाला आहे. ज्याच्याकडे देवदूत चढतात.

७) रुहने अभिप्रेत ह.जिब्रईल عليه السلام आहेत. त्यांच्या मोठ्या शानला दृष्टीसमोर ठेवून, त्यांचा वेगळा विशेष उल्लेख केला गेला आहे. नाही तर देवदुतांमध्ये ते पण शामील आहेत. किंवा आत्म्याने अभिप्रेत मानवाचे आत्मे आहेत, जे मेल्यानंतर आकाशावर घेऊन जाण्यांत येतात. जसे की, काही रिवायतीमध्ये आहे.

८) या दिवसाच्या निश्चितीत खूपच मतभेद आहेत. जसे की, अलीफ-लाम-मीम सजद्याच्या सुरवातीला आम्ही सांगून आलो आहोत. येथे ईमाम इब्ने कसीरने चार कौल नोंदविले आहेत. पहिला कौल हा आहे की, याच्याने ते अंतर अभिप्रेत आहे जे (अल्लाहच्या) महासिंहासनापासून असफले साफिलीन (जमिनीच्या सातव्या तबक्या) पर्यंत आहे हे अंतर ५० हजार वर्षात पूर्ण होणार आहे. दुसरा कौल आहे की, ही या जगाची एकूण मुदत आहे. जगाच्या निर्मितीच्या प्रारंभापासून कयामत घडून येण्यापर्यंत. याच्यातून किती मुदत होऊन गेली आणि किती बाकी आहे, याला फक्त अल्लाहतआलाच जाणतो. तिसरा कौल आहे की, हे इहलोक आणि परलोकातील अंतर आहे. चवथा कौल हा आहे की, ही कयामतच्या दिवसाची गणती आहे. म्हणजे काफिरांवर हा हिशेबाचा दिवस पन्नास हजार वर्षांप्रमाणे भारी होईल. परंतु ईमानवाल्यांकरीतां, जगांत एक फर्ज नमाज पढण्यापेक्षा सुद्धा लहान (संक्षिप्त) होईल. (मुसनद अहमद ७५/३) ईमाम इब्ने कसीरने या म्हणण्याला प्राधान्य दिले आहे. कारण की हदीसींनी सुद्धा याचे समर्थन होते. म्हणून एका हदीसमध्ये जकात अदा न करणाऱ्याला कयामतच्या दिवशी जी शिक्षा दिली जाईल, त्याचा तपशील वर्णन करतांना, रसूलुल्लाह ﷺ नी फर्माविले, ''येथ पावेतो की अल्लाह आपल्या सेवकांदर्म्यान फैसला करील, अशा दिवसांत ज्याची मुदत तुमच्या गणती नुसार पन्नास हजार वर्षे होईल.'' (स.मुस्लीम) या भाष्यानुसार 'फी यौमिन्' चा संबंध शिक्षेशी होईल. म्हणजे ती देण्यांत येणारी शिक्षा कयामतच्या दिवशी होईल, जो काफिरांवर पन्नास हजार वर्षांइतका भारी होईल.

९) दूरने अभिप्रेत अशक्य, आणि जवळने, त्याचे निश्चित घडून येणे आहे. म्हणजे काफिर कयामतला अशक्य समजतात. आणि मुसलमानांची धारणा आहे की, ती जरूर येऊनच राहील. या करीतांकी, ''प्रत्येक येणारी गोष्ट जवळच आहे.''

१०) म्हणजे पिंजलेल्या कापसाप्रमाणे, जसे सू.कारिअ: मध्ये आहे. 'कल् इहनिल् मनफूश'.

११) परंतु सर्वांना आपले आपले पडले असेल. म्हणून ओळखून सुद्धां, एक दुसऱ्याला विचारणार नाहीत.

१२) म्हणजे संतती, पत्नी, भाऊ आणि कुटूंब या साऱ्या गोष्टी माणसाला फार प्रिय असतात. परंतु कयामतच्या दिवशी अपराधी इच्छील की, याच्या प्राणमुल्यांत या प्रिय वस्तू कबूल करून घेण्यांत याव्यांत, आणि त्याला सोडून देण्यांत यावे. 'फसिलतून घराण्याला' म्हणतात. कारण की ते कुटुंबापेक्षा वेगळे असते.

كَلَّا ۖ إِنَّهَا لَظَىٰ ﴿١٥﴾
(परंतु) असे मुळीच होणार नाही; खचित्‌च ती डोंब उसळणारी आग[१] आहे. (१५)

نَزَّاعَةً لِّلشَّوَىٰ ﴿١٦﴾
जी तोंड आणि माथ्याची कातडी खेंचून आणणारी आहे.[२] (१६)

تَدْعُوا مَنْ أَدْبَرَ وَتَوَلَّىٰ ﴿١٧﴾
तो प्रत्येक त्या माणसाला बोलाविल. जो मागे सरकतो आणि तोंड फिरवितो (१७)

وَجَمَعَ فَأَوْعَىٰ ﴿١٨﴾
आणि गोळा करून सांभाळून ठेवतो[३] (१८)

إِنَّ الْإِنسَانَ خُلِقَ هَلُوعًا ﴿١٩﴾
नि:संशय मनुष्य फारच दुर्बल मनाचा[४] निर्माण केला गेला आहे. (१९)

إِذَا مَسَّهُ الشَّرُّ جَزُوعًا ﴿٢٠﴾
जेव्हा त्याला एखादे संकट पोहचते तर तो घाबरून जातो. (२०)

وَإِذَا مَسَّهُ الْخَيْرُ مَنُوعًا ﴿٢١﴾
आणि जेव्हा त्याला लाभ होतो, तेव्हा कंजुषी करू लागतो (२१)

إِلَّا الْمُصَلِّينَ ﴿٢٢﴾
परंतु ते नमाजी (२२)

الَّذِينَ هُمْ عَلَىٰ صَلَاتِهِمْ دَائِمُونَ ﴿٢٣﴾
जे आपल्या नमाजीवर नित्य कायम असतात.[५] (२३)

وَالَّذِينَ فِي أَمْوَالِهِمْ حَقٌّ مَّعْلُومٌ ﴿٢٤﴾
आणि ज्याच्या धनसंपत्तीत नियमित वांटा आहे.[६] (२४)

لِّلسَّائِلِ وَالْمَحْرُومِ ﴿٢٥﴾
मागणाऱ्यांचा सुद्धा आणि मागण्यापासून वांचणाऱ्यांचा सुद्धा[७] (२५)

وَالَّذِينَ يُصَدِّقُونَ بِيَوْمِ الدِّينِ ﴿٢٦﴾
आणि जे निर्णयाच्या दिवसाचा विश्वास बाळगतात.[८] (२६)

१) म्हणजे तो नरकाग्नी. हे त्याच्या तीव्र उष्णतेचे वर्णन आहे.

२) म्हणजे मांस आणि कातडीला जाळून टाकेल; मनुष्य फक्त हाडांचा सांगाडा राहून जाईल.

३) म्हणजे जो जगांत सत्त्यापासून पाठ फिरवितो, आणि विमुख होतो. आणि धन जमा करून खजिन्यांत सांभाळून ठेवतो; त्याला अल्लाहच्या मार्गांत खर्च करीत नाही.त्याच्यातून जकात काढीत नाही. अल्लाहतआला नरकाग्नीला बोलण्याची शक्ती प्रदान करेल, नरकाग्नी स्वत: आपल्या मुखाने त्यांना बोलावील, ज्यांच्यावर आपल्या कर्मांच्या बदल्यांत नरकाग्नी आवश्यक होऊन जाईल. काही म्हणतात की बोलाविणारे तर देवदूतच असतील. त्याला नरकाग्नीकडे संबंधित करून दिले गेले आहे. काही म्हणतात की कोणी बोलाविणार नाही, फक्त उपमा म्हणून असे सांगण्यांत आले आहे. अर्थ आहे की, चर्चित माणसांचे ठिकाण नरकाग्नी होईल.

४) फारच लोभी आणि फारच हाय हाय करणारे, यांना 'हलुअ' म्हटले जाते. ज्याला भाषांतरांत फारच कच्च्या मनाने म्हणून संबोधित केले गेले आहे. कारण की असा मनुष्यच कंजुष व लोभी जास्त हाय हाय करणारा असतो. पुढे त्याचे वैशिष्ट्य वर्णन केले गेले आहे.

५) अभिप्रेत आहे परिपूर्ण ईमानवाला आणि एकेश्वरवादी. त्यांच्यामध्ये चर्चित चारित्र्य विषयक दुर्बलता नसते. किंबहुना त्याच्या उलट, ते सद्‌गुणांचे पुतळे असतात. नेहमी नमाज पढण्याचा अर्थ आहे, ते नमाजीत कोताई करीत नाहीत. प्रत्येक नमाज आपल्या वेळेवर आणि फारच नियमितपणे, आणि काळजीपूर्वक पढतात. कोणी व्यस्तता त्यांना नमाजीपासून रोकत नाही आणि कुठलाही ऐहिक फायदा त्यांना नमाजीपासून गाफील करीत नाही.

६) म्हणजे फर्ज झालेली जकात. काहींच्या जवळ ही सर्वसाधारण आहे. हिच्यात वाजीब आणि नफील दानधर्म दोन्ही शामील आहेत.

७) महेरूम (वंचित्) मध्ये तो मनुष्य पण शामील आहे, जो अन्नसंपदेपासून पण वंचित आहे. तो सुद्धा जो आकाशांतील आणि जमिनीवरील आपत्तीच्या माऱ्यांत येऊन, आपल्या भांडवलापासून वंचित होऊन गेला असेल; आणि तो सुद्धा जो गरजूंअसून सुद्धा आपल्या लज्जतेमुळे, जो लोकांच्या देणग्या आणि दानधर्मापासून वंचित् राहतो.

८) म्हणजे ते याचा इन्कार करीत नाही आणि याच्यात शंका कुशंका व्यक्त करीत नाहीत.

وَ الَّذِيْنَ هُمْ مِّنْ عَذَابِ رَبِّهِمْ مُّشْفِقُوْنَ ﴿٢٧﴾
आणि ते, जे आपल्या पालनकर्त्याच्या शिक्षेस भीत राहतात.[१] ㉗

اِنَّ عَذَابَ رَبِّهِمْ غَيْرُ مَاْمُوْنٍ ﴿٢٨﴾
खचित्‌च त्यांच्या पालनकर्त्याची शिक्षा निर्भय होण्याची गोष्ट नव्हे![२] ㉘

وَ الَّذِيْنَ هُمْ لِفُرُوْجِهِمْ حٰفِظُوْنَ ﴿٢٩﴾
आणि जे लोक आपल्या गुप्तांगाचे (निषीद्ध पासून) संरक्षण करतात; ㉙

اِلَّا عَلٰۤى اَزْوَاجِهِمْ اَوْ مَا مَلَكَتْ اَيْمَانُهُمْ فَاِنَّهُمْ غَيْرُ مَلُوْمِيْنَ ﴿٣٠﴾
परंतु होय! त्यांच्या पत्न्यापासून, आणि दाशांपासून, ज्यांचे ते मालक आहेत, त्यांना काही दोष लावला जाणार नाही.[३] ㉚

فَمَنِ ابْتَغٰى وَرَآءَ ذٰلِكَ فَاُولٰٓئِكَ هُمُ الْعٰدُوْنَ ﴿٣١﴾
आता जो कोणी याच्या शिवाय (मार्ग) शोधेल, तर असे लोक मर्यादेचे उल्लंघन करणारे असतील ㉛

وَ الَّذِيْنَ هُمْ لِاَمٰنٰتِهِمْ وَ عَهْدِهِمْ رٰعُوْنَ ﴿٣٢﴾
आणि जे आपल्या ठेवींचा आणि आपल्या करारांचा प्रत्येक क्षणी विचार बाळगतात[४] ㉜

وَالَّذِيْنَ هُمْ بِشَهٰدٰتِهِمْ قَآئِمُوْنَ ﴿٣٣﴾
आणि जे आपल्या साक्षीवर सरळ आणि कायम राहतात[५] ㉝

وَالَّذِيْنَ هُمْ عَلٰى صَلَاتِهِمْ يُحَافِظُوْنَ ﴿٣٤﴾
आणि जे आपल्या नमाजीची काळजी बाळगतात ㉞

اُولٰٓئِكَ فِيْ جَنّٰتٍ مُّكْرَمُوْنَ ﴿٣٥﴾
याच लोकांचा स्वर्गांच्या बागांत आदर सन्मान केला जाईल. ㉟

فَمَالِ الَّذِيْنَ كَفَرُوْا قِبَلَكَ مُهْطِعِيْنَ ﴿٣٦﴾
तर हे काफिर तुझ्याकडे का धांवत येत आहे? ㊱

عَنِ الْيَمِيْنِ وَعَنِ الشِّمَالِ عِزِيْنَ ﴿٣٧﴾
उजवीकडून आणि डावीकडून, टोळ्याच्या टोळ्या.[६] ㊲

اَيَطْمَعُ كُلُّ امْرِئٍ مِّنْهُمْ اَنْ يُّدْخَلَ جَنَّةَ نَعِيْمٍ ﴿٣٨﴾
काय यांच्यातून प्रत्येकाची अपेक्षा ही आहे की, तो आनंदाच्या स्वर्गात दाखल केला जाईल? ㊳

१) म्हणजे आज्ञापालन आणि चांगली कर्मे असून सुद्धा, अल्लाहची उच्चता आणि महानता दृष्टीसमोर ठेवून त्याच्या पकडीपासून भयभित राहतात. आणि विश्वास बाळगतात की, जो पर्यंत अल्लाहची दया आम्हास, त्याच्या पदराखाली झांकून घेणार नाही, आमची कर्मे आमच्या मुक्तीसाठी पुरेशी होणार नाही. जशी की या भावार्थाची हदीस मागे येऊन चुकली.

२) ही मागील विषयाचीच ताकीद आहे की, अल्लाहच्या शिक्षेपासून कोणालाही निर्भय होता कामा नये. किंबहुना नेहमी त्याला भीत राहिले पाहिजे आणि त्याच्या शिक्षेपासून वांचण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला गेला पाहिजे.

३) म्हणजे माणसाच्या वैषयिक (लैंगिक) समाधानाकरीता, अल्लाहने जे विहीत मार्ग ठेवले आहेत, एक पत्नी आणि दुसरी उजव्या हाताचा माल म्हणजे दासी आजकाल उजव्या हाताच्या मालाची, समस्या इस्लामने दाखविलेल्या मर्यादानुसार जवळ जवळ संपून गेली आहे. तथापि त्याला कायदेशीर यासाठी संपविण्यात आले नाही की, भविष्यांत कधी, अशा प्रकारची परिस्थिती झाली तर दासीपासून फायदा उचलला जाऊ शकतो. तथापि ईमानवाल्यांचे एक वैशिष्ट्य हे पण आहे की, ते वैषयिक इच्छेचे समाधान आणि त्याला पूर्ण करण्याच्या अयोग्य मार्गांचा अंगिकार करीत नाहीत.

४) म्हणजे यांच्याजवळ लोकांच्या ज्या ठेवी ठेवलेल्या असतात, त्यांत ते लबाडी करीत नाही आणि लोकांशी जो करार करतात, त्याला तोडत नाहीत. किंबहुना त्याचे पालन करतात.

५) म्हणजे त्याला बरोबर अदा करतात. मग जरी त्याच्या माऱ्यांत त्यांच्या जवळचे प्रिय आप्तेष्ट का येऊन जाईनात! याशिवाय त्याला लपवत सुद्धा नाही. तसेच त्यांच्यात बदल पण करीत नाहीत.

६) हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या काळांतील काफिरांचा उल्लेख आहे की, ते आपल्या सभेला धांवत धांवत येत; परंतु आपल्या गोष्टी ऐकून, त्यावर अंमलबजावणी करण्याऐवजी त्यांची थट्टा करीत आणि टोळ्यामध्ये विभागून जात आणि दावा हा करीत की, जर मुसलमान स्वर्गांत गेले, तर आम्ही त्यांच्या पूर्वी स्वर्गांत जाऊं. अल्लाहने पुढील महावाक्यांत त्यांच्या या निरर्थक फुशारकीचे खंडन केले.

كَلَّاؕ اِنَّا خَلَقْنٰهُمْ مِّمَّا يَعْلَمُوْنَ ﴿٣٩﴾

(असे) मुळीच होणार नाही.[१] आम्ही त्यांना त्याच वस्तुंपासून निर्माण केले आहे, जिला ते जाणतात[२] (३९)

فَلَآ اُقْسِمُ بِرَبِّ الْمَشٰرِقِ وَ الْمَغٰرِبِ اِنَّا لَقٰدِرُوْنَ ﴿٤٠﴾

तर मला शपथ आहे. पूर्वेच्या आणि पश्चिमेच्या[३] (भिन्न स्थानांच्या) मालकांची की, आम्ही खचित्‌च समर्थ आहोत. (४०)

عَلٰۤى اَنْ نُّبَدِّلَ خَيْرًا مِّنْهُمْ ۙ وَمَا نَحْنُ بِمَسْبُوْقِيْنَ ﴿٤١﴾

यावर की, त्यांच्या ऐवजी, त्यांच्यापेक्षा चांगले लोक घेऊन यावे.[४] आणि आम्ही असमर्थ नाही.[५] (४१)

فَذَرْهُمْ يَخُوْضُوْا وَ يَلْعَبُوْا حَتّٰى يُلٰقُوْا يَوْمَهُمُ الَّذِىْ يُوْعَدُوْنَ ﴿٤٢﴾

तर तू त्यांना निरर्थक गोष्टी करतांना आणि खेळतांना सोडून दे![६] येथपावेतो की, हे आपल्या त्या दिवसाला जाऊन मिळावेत, ज्याचा यांच्याशी वायदा केला जात आहे. (४२)

يَوْمَ يَخْرُجُوْنَ مِنَ الْاَجْدَاثِ سِرَاعًا كَاَنَّهُمْ اِلٰى نُصُبٍ يُّوْفِضُوْنَ ﴿٤٣﴾

ज्या दिवशी हे थडग्यातून (धांवत) पळत निघतील. जणूंकी ते कोण्या निशाणाकडे लवकर लवकर जात आहेत.[७] (४३)

خَاشِعَةً اَبْصَارُهُمْ تَرْهَقُهُمْ ذِلَّةٌ ؕ ذٰلِكَ الْيَوْمُ الَّذِىْ كَانُوْا يُوْعَدُوْنَ ﴿٤٤﴾

आणि यांच्या नजरा खाली झुकलेल्या असतील.[८] त्यांच्यावर हीनत्व पसरलेले असेल.[९] हा आहे तो दिवस ज्याचा यांच्याशी वायदा केला जात होता.[१०] (४४)

اٰيَاتُهَا ٢٨ (٧١) سُوْرَةُ نُوْحٍ مَّكِّيَّةٌ (٧١) رُكُوْعَاتُهَا ٢

## (७१) सू. नूह

महावाक्ये २८ | रुकूअ २

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِنَّاۤ اَرْسَلْنَا نُوْحًا اِلٰى قَوْمِهٖۤ اَنْ اَنْذِرْ قَوْمَكَ مِنْ قَبْلِ اَنْ يَّاْتِيَهُمْ عَذَابٌ اَلِيْمٌ ﴿١﴾

खचित्‌च आम्ही नूहला त्याच्या लोकांकडे पाठविले[११] की आपल्या लोकांना भय घाल (आणि सावध करून दे!) याच्या पूर्वी की त्यांच्याजवळ दुःखप्रद शिक्षा येऊन पडेल[१२] (१)

قَالَ يٰقَوْمِ اِنِّىْ لَـكُمْ نَذِيْرٌ مُّبِيْنٌ ۙ ﴿٢﴾

नूहने म्हटले हे माझ्या लोकांनो! मी तुम्हास स्पष्ट स्पष्ट भिवविणारा आहे.[१३] (२)

اَنِ اعْبُدُوا اللّٰهَ وَاتَّقُوْهُ وَاَطِيْعُوْنِ ۙ ﴿٣﴾

की, तुम्ही अल्लाहची उपासना करा.[१४] आणि त्याला[१५] भ्या. आणि माझा कह्या माना[१६] (३)

يَغْفِرْ لَـكُمْ مِّنْ ذُنُوْبِكُمْ وَيُؤَخِّرْكُمْ اِلٰۤى اَجَلٍ مُّسَمًّى ؕ اِنَّ اَجَلَ اللّٰهِ اِذَا جَآءَ لَا يُؤَخَّرُ ۘ لَوْ كُنْتُمْ تَعْلَمُوْنَ ﴿٤﴾

तर तो तुमचे अपराध क्षमा करून टाकेन, आणि तुम्हास एका निश्चित वेळेपर्यंत सोडून देईल.[१७] खचित्‌च अल्लाहचा वायदा जेव्हा येऊन पोहचतो, तेव्हा तो टळत नाही[१८] काश! जर तुम्ही जाणत असता.[१९] (४)

قَالَ رَبِّ اِنِّىْ دَعَوْتُ قَوْمِىْ لَيْلًا وَّنَهَارًا ۙ ﴿٥﴾

(नूहने) म्हटले हे माझ्या पालनकर्त्या! मी आपल्या लोकांना रात्रंदिवस तुझ्याकडे बोलाविले[२०] (५)

فَلَمْ يَزِدْهُمْ دُعَآءِىْۤ اِلَّا فِرَارًا ﴿٦﴾

परंतु माझ्या बोलाविण्याने हे पळण्यात आणखी वाढून गेलेत.[२१] (६)

१) म्हणजे कशा प्रकारे शक्य आहे की, ईमानवाला आणि काफिर दोन्ही स्वर्गात जातील? पैगंबराला मानणारे आणि त्याला खोटे म्हणणारे दोघांना परलोकांतील देणग्या मिळतील? असे कधी होऊं शकत नाही.

२) म्हणजे 'माईन महीन' (क्षुल्लक पाण्या) पासून जर अशी गोष्ट आहे तर काय गर्व, मनुष्याला शोभतो? ज्या गर्वामुळेच तो, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराला खोटे पण ठरवतो.

३) दररोज सूर्य एका वेगळ्या ठिकाणाहून उगवतो आणि एका वेगळ्या पश्चिमेला मावळतो. या अनुषंगाने पूर्व पण पुष्कळ आहेत आणि पश्चिमपण तितक्याच. आणखी तपशीलासाठी सू.साफ्फात – ५ पहावे.

४) म्हणजे त्यांना संपवून एक वेगळी सृष्टी वसविण्याला आम्ही पूर्ण समर्थ आहोत.
५) जेव्हा असे आहे तर काय आम्ही कयामतच्या दिवशी त्यांना दुसऱ्यांदा जिवंत उठवू शकणार नाही?
६) म्हणजे व्यर्थ आणि निरर्थक वाद विवादांत फसावे आणि आपल्याच दुनियेत मग्न रहावे. तथापि आपण आपल्या प्रचाराचे काम चालू ठेवावे. त्यांची वागणूक तुम्हांस आपल्या पदाकडून गाफील किंवा बेदिल न करून टाको!
७) 'अजदास' अनेक वचन आहे. 'जदस' चा अर्थ कबर आहे. 'नुसूब' ठाणे जेथे मूर्तींच्या नांवावर जनावरे जबाह केली जातात आणि मूर्तींच्या अर्थांत पण याचा उपयोग करतात. येथे याच दुसऱ्या अर्थांत आहे. मूर्तींचे पुजारी, जेव्हा सूर्य उगवितो, तेव्हा फारच तेजीने मूर्तींकडे धांवतात की, कोण त्यांना प्रथम चुंबन देतो. काही याला 'अल्‌म' च्या अर्थांत घेतात की, ज्याप्रमाणे युद्धाच्या मैदानांत सैनिक आपल्या 'अलम्' (झेंड्या) कडे धावतात. अशाच प्रकारे कयामतच्या दिवशी कबरीमधून फारच जलद् गतीने निघतील.
८) ज्याप्रमाणे अपराध्यांच्या नजरा झुकलेल्या असतात. कारण की त्यांना आपले कर्तृत्व ठाऊक असते.
९) म्हणजे फारच हीनत्व त्यांना आपल्या लपेटीत घेत असेल; आणि त्याचे चेहरे भयामुळे काळे पडले असतील.
१०) म्हणजे पैगंबरांच्या मुखाने आणि आकाशी ग्रंथाच्या द्वारे.
११) हजरत नूह عليه السلام मोठे शानवाले, फारच सन्माननीय पैगंबरांमधून आहेत. स.मुस्लिम वगैरेंच्या शफाअतच्या हदीसमध्ये आहे की, हे पहिले रसूल आहेत. तसेच असे म्हणतात की, यांच्याच लोकांमधून शिर्क चा प्रारंभ झाला. म्हणून अल्लाहतआलाने त्यांना आपल्या लोकांच्या सन्मार्ग दर्शनार्थ पैगंबर बनवून पाठविले.
१२) कयामतची शिक्षा किंवा जगांत शिक्षा येण्याच्या पूर्वी, जसे त्या लोकांवर (पाण्याचा) प्रलय आला.
१३) अल्लाहच्या शिक्षेने, जर तुम्ही ईमान आणले नाही. म्हणूनच शिक्षेपासून सुटकेचा उपाय, तुम्हांस दाखविण्यासाठी मी आलो आहे. जो पुढे सांगण्यांत येत आहे.
१४) आणि शिर्क सोडून द्या फक्त त्या एकाचीच उपासना करा.
१५) अल्लाहच्या आज्ञाभंगापासून वांचा! ज्यामुळे तुम्ही अल्लाहच्या शिक्षेला पात्र ठरुंशकतात.
१६) म्हणजे मी तुम्हास ज्या गोष्टींचा हुकूम देईल, त्यांत माझे आज्ञापालन करा. यासाठी की, मी तुमच्याकडे अल्लाहचा पैगंबर आणि त्याचा प्रतिनिधी बनून आलो आहे.
१७) याचा अर्थ हा केला गेला आहे की, ईमान आणण्याच्या स्वरुपांत तुमच्या मृत्यूची जी मुदत निश्चित आहे, इला पुढे ढकलून, तुम्हास आणखी आयुष्यांत सवलत देईल. आणि ती शिक्षा तुमच्यापासून दूर करून देईल. जी ईमान न आणण्यामुळे तुमच्या नशिबी होती. म्हणून या महावाक्याने आधार घेत सांगण्यात आले आहे की, अल्लाहचे आज्ञापालन पुण्य आणि आप्तसंबंध कायम राखणे. यामुळे खरोखरच आयुष्यांत वाढ होते. हदीसमध्ये सुद्धांआहे ''सिला रहमी, आयुष्याच्या वाढीला कारणीभूत आहे.'' (इब्ने कसीर) काही म्हणतात, उशीराचा अर्थ बरकतचा आहे. ईमानामुळे आयुष्यांत बरकत होईल. ईमान आणणार नाही तर या बरकतीपासून वंचित राहाल.
१८) किंबहुना खरोखर घडून राहील. म्हणून तुमच्यासाठी उत्तम यांतच आहे की, ईमान आणि आज्ञापालनाचा मार्ग ताबडतोब अंगीकारा. उशीर करण्यात धोका आहे की, अल्लाहच्या शिक्षेच्या वायद्याच्या लपेटीत न येऊन जावे.
१९) म्हणजे तुम्हास ज्ञान असते; तर तुम्ही त्यांचा अंगिकार करण्यांत घाई केली असती, ज्याचा मी तुम्हांस हुकूम देत आहे. किंवा जर तुम्ही ही गोष्ट जाणली असती की, जेव्हा अल्लाहची शिक्षा येते; तेव्हा ती टळत नाही.
२०) म्हणजे तुझ्या हुकूमाच्या अंमलबजावणीमध्ये, कुठल्याही कुचराईशिवाय रात्रंदिवस मी तुझा संदेश आपल्या लोकांना पोहचविला आहे.
२१) म्हणजे माझ्या बोलविण्याने हे ईमानापासून आणखी दूर होऊन गेले आहेत. जेव्हा कोणी समाज मार्गभ्रष्टतेच्या शेवटच्या टोकाला पोहचून जातो. तर मग त्याची हीच स्थिती होऊन जाते; त्याला जेवढे अल्लाहकडे बोलवा, तो तेवढाच दूर पळतो.

وَإِنِّي كُلَّمَا دَعَوْتُهُمْ لِتَغْفِرَ لَهُمْ جَعَلُوٓا أَصَابِعَهُمْ
فِيٓ آذَانِهِمْ وَاسْتَغْشَوْا ثِيَابَهُمْ وَأَصَرُّوا وَاسْتَكْبَرُوا
اسْتِكْبَارًا ۝٧

मी जेव्हा कधी त्यांना तुझ्या क्षमेकरीता बोलाविले, [१] त्यांनी आपली बोटे आपल्या कानांत घालून घेतली; [२] आणि आपल्यावर वरून आपले कपडे पांघरुण घेतले. [३] आणि अडून बसले; [४] आणि शिरजोरी केली. [५] (७)

ثُمَّ إِنِّي دَعَوْتُهُمْ جِهَارًا ۝٨

तद्नंतर मी त्यांना मोठ्याने बोलाविले. (८)

ثُمَّ إِنِّيٓ أَعْلَنْتُ لَهُمْ وَأَسْرَرْتُ لَهُمْ إِسْرَارًا ۝٩

आणि निःसंशय मी त्यांना जाहीरपणे पण सांगितले आणि गुप्तपणे सुद्धा [६] (९)

فَقُلْتُ اسْتَغْفِرُوا رَبَّكُمْ إِنَّهُ كَانَ غَفَّارًا ۝١٠

आणि मी म्हटले आपल्या पालनकर्त्याजवळ आपल्या पापांची क्षमा मागा; [७] (आणि माफी मागा.) तो खचित्च मोठा क्षमाकर्ता आहे. [८] (१०)

يُرْسِلِ السَّمَآءَ عَلَيْكُمْ مِدْرَارًا ۝١١

तो तुमच्यावर आकाशाला खूप वर्षाव करतांना सोडून देईल. (११)

وَيُمْدِدْكُمْ بِأَمْوَالٍ وَبَنِينَ وَيَجْعَلْ لَكُمْ جَنَّاتٍ
وَيَجْعَلْ لَكُمْ أَنْهَارًا ۝١٢

आणि तुम्हास खूप एकामागून एक, धनदौलत आणि संततीमध्ये प्रगती देईल. आणि तुम्हास बाग (बगीचे) देईल. आणि तुमच्याकरीता पाण्याचे पाट वाहवून देईल. [९] (१२)

مَا لَكُمْ لَا تَرْجُونَ لِلَّهِ وَقَارًا ۝١٣

तुम्हास काय होऊन गेले आहे की, तुम्ही अल्लाहच्या श्रेष्ठत्वाची धारणा ठेवीत नाही? [१०] (१३)

وَقَدْ خَلَقَكُمْ أَطْوَارًا ۝١٤

वास्तविक पाहता, त्याने तुम्हास तऱ्हेतऱ्हेने निर्माण [११] केले आहे. (१४)

أَلَمْ تَرَوْا كَيْفَ خَلَقَ اللَّهُ سَبْعَ سَمَاوَاتٍ طِبَاقًا ۝١٥

काय तुम्ही पाहत नाही की, अल्लाहतआलाने वर खाली, कशाप्रकारे सात आकाशे निर्माण करून दिली आहेत. [१२] (१५)

وَجَعَلَ الْقَمَرَ فِيهِنَّ نُورًا وَجَعَلَ الشَّمْسَ سِرَاجًا ۝١٦

आणि त्याच्यांत चंद्रालाही खूप प्रकाशित बनविले [१३] आहे आणि सूर्याला एक प्रकाशित दिवा बनविले. [१४] (१६)

وَاللَّهُ أَنْبَتَكُمْ مِنَ الْأَرْضِ نَبَاتًا ۝١٧

आणि तुम्हास जमिनीतून (एका खास पद्धतीने) उगविले आहे. [१५] (आणि निर्माण केले आहे.) (१७)

ثُمَّ يُعِيدُكُمْ فِيهَا وَيُخْرِجُكُمْ إِخْرَاجًا ۝١٨

मग तुम्हांस इच्यांतच पालटवून घेतले जाईल. आणि (एका खास पद्धतीने) पुन्हा काढून [१६] उभे करील (१८)

وَاللَّهُ جَعَلَ لَكُمُ الْأَرْضَ بِسَاطًا ۝١٩

आणि तुमच्याकरीता अल्लाहने जमिनीला बिछाईत बनवून दिले आहे. [१७] (१९)

لِتَسْلُكُوا مِنْهَا سُبُلًا فِجَاجًا ۝٢٠

जेणे करून तुम्ही इच्या प्रशस्त मार्गांत चालत फिरावे. [१८] (२०)

१) म्हणजे ईमान आणि आज्ञापालनाकडे जी क्षमादानांची सबब आहे.

२) कारण की, त्यांनी माझा आवाज ऐकू शकू नये.

३) कारण की माझा चेहरा पाहूशकू नये. किंवा आपल्या डोक्यावरून पांघरुण घेतले कारण की माझे म्हणणे ऐकू शकू नये. हे त्यांच्याकडून उघड शत्रुत्वाचे आणि हितोपदेशापासून निरपेक्षतेचे प्रदर्शन आहे. काही म्हणतात, आपल्याला कपड्याने झांकून घेण्याचा उद्देश्य हा होता की, पैगंबराने त्यांना ओळखू न शकावे; आणि त्यांना आवाहनाला मान्य करण्यास भाग पाडू नये.

४) म्हणजे कुफ्रवर अडून राहिले. त्यापासून परावृत्त झाले नाही. आणि पश्चात्ताप व्यक्त केला नाही.

५) सत्याला मान्य करणे आणि आदेशाची अंमलबजावणी यापासून त्यांनी फारच अहंकार केला.

६) म्हणजे वेगवेगळे अंदाज आणि पद्धतीने त्यांना आवाहन केले. काही म्हणतात की संमेलनामध्ये आणि सभांमध्ये

सुद्धा त्यांना आवाहन केले. आणि घरांमध्ये सुद्धा व्यक्तीश: तुझा संदेश पोहचविला.

७) म्हणजे ईमान आणि आज्ञापालनाचा मार्ग अनुसरा, आणि आपल्या पालनकर्त्याजवळ मागील अपराधांची क्षमा मागून घ्या.

८) तो तौबा करणाऱ्यांसाठी फारच दयाळूआणि क्षमाकर्ता आहे.

९) म्हणजे ईमान आणि आज्ञापालनाने तुम्हास पारलौकीक देणग्याच बहाल करणार नाही; किंबहुना ऐहिक धनदौलत आणि पुत्रांच्या विपुलतेने सुद्धा तुम्ही बहाल केले जाल काही धर्मपंडित याच महावाक्यामुळे पाणी मागण्याच्या नमाजीमध्ये, सू.नूहच्या पढण्याला मुस्तहब (पसंत) समजतात. सांगितले गेले आहे की, ह.उमर ﷺ एकदा पाऊस मागण्याच्या नमाजीमध्ये, मिंबरवर चढले, तेव्हा फक्त क्षमायाचनेचीच महावाक्ये (ज्यांत हे महावाक्य पण होते) पढून मिंबरवरून उतरून गेले आणि फर्माविले की, मी पावसाला पावसाच्या त्या मार्गाद्वारे मागितले आहे, जे आकाशांमध्ये आहे. ज्यांच्याने पाऊस जमिनीवर उतरतो. (इब्ने कसीर) हजरत हसन बसरीशी संबंधित सांगण्यांत येते की, त्यांच्याजवळ येऊन कोणी दुष्काळाची तक्रार केली. तर त्यांनी त्याला क्षमायाचना (इस्तगफार) करण्याचा उपदेश केला. कोणी दुसऱ्या माणसाने उपासमारीची तक्रार केली. त्याला सुद्धा त्यांनी हाच उपाय सांगितला. कोण्या आणखी माणसाने, आपली बाग वाळून गेल्याची तक्रार केली. त्याला पण सांगितले इस्तगफार कर! एका माणसाने म्हटले माझ्या घरांत संतती होत नाही. त्याला पण सांगितले, आपल्या पालनकर्त्याजवळ क्षमायाचना कर. एका माणसाने त्यांना विचारले की, सर्वांनाच आपण इस्तगफार करण्याचीच ताकीद का केली? तर आपण हेच महावाक्य पठण करून, सांगितले की मी आपल्याकडून ही गोष्ट सांगितली नाही. हा तो उपाय आहे, जो या सर्व गोष्टींकरता अल्लाहने दाखविला आहे. (अयसरु तफासीर)

१०) 'वकार' तौकीरपासून आहे. म्हणजे महत्ता, आणि 'रजा' भयाच्या अर्थांत आहे. म्हणजे ज्याप्रमाणे त्याच्या महात्म्याचा हक्क आहे, तुम्ही त्याला का भित नाही? आणि त्याला एक का मानत नाही? आणि त्याचे आज्ञापालन का करीत नाही?

११) पहिले वीर्य बिंदू मग जमलेले रक्त, मग मासांचे लोथडे, मग हाडे आणि मासं, मग पूर्ण (मनुष्य) निर्मिती. जसे की, सू.अंबिया-५, सू.अल्मोमिनून-१४ आणि सू.अल्मोमिन-६७ वगैरे मध्ये तपशील येऊन चुकला.

१२) जे याच्या सामर्थ्यावर आणि कारागिरीच्या कमालीवर प्रामाण्य करतात. आणि या गोष्टीकडे इशारा करतात की उपासनेला योग्य फक्त तोच एक अल्लाह आहे.

१३) जो जमिनीच्या पृष्ठभागाला प्रकाशित करणारा आहे.

१४) यासाठी की त्याच्या प्रकाशांत, मनुष्याने रोजीरोटीसाठी, जी मनुष्याची न टाळता येणारी एक आवश्यक गरज आहे, कला कौशल्य आणि श्रम करूंशकावे.

१५) म्हणजे तुमचे वडील ह.आदम عليه السلام ला ज्यांना मातीपासून बनविण्यांत आले आणि मग अल्लाहने त्याच्यांत आत्मा फुंकला. किंवा जर तमाम मनुष्य जातीला संबोधित समजण्यांत येईल, तर अर्थ होईल, तुम्ही ज्या वीर्य बिंदुपासून निर्माण होतात तो त्याच अन्नापासून बनतो, जे जमिनीपासून प्राप्त होते. या अनुषंगाने सर्वांची निर्मिती मूळ जमीनच ठरते.

१६) म्हणजे मरून, पुन्हा याच मातीत दफन होणे आहे. आणि मग कयामतच्या दिवशी याच जमिनीतून तुम्हांस जिवंत करून काढले जाईल.

१७) म्हणजे तिला बिछायतीप्रमाणे अंथरुण दिले आहे. तुम्ही याच्यावर अशाप्रकारे चालतात फिरतात जसे आपल्या घरांत अंथरलेल्या जमिनीवर चालतात आणि उठता बसतात.

१८) 'सुबुल' सबीलचे अनेकवचन आहे. आणि 'फिजाज' 'फज्जुन' (प्रशस्त मार्ग) चे अनेकवचन आहे. म्हणजे या जमिनीवर अल्लाहतआलाने मोठमोठे प्रशस्त मार्ग बनवून दिले आहे की, मनुष्याने, एका जागेवरून दुसऱ्या जागेवर एका शहरातून दुसऱ्या शहरांत, किंवा एका देशातून दुसऱ्या देशात जाऊ शकावे. म्हणून हे रस्ते सुद्धा माणसाच्या कारभाराची आणि शहराची गरज आहे. ज्याची व्यवस्था करून अल्लाहने माणसांवर एक मोठाच उपकार केला आहे.

قَالَ نُوحٌ رَّبِّ إِنَّهُمْ عَصَوْنِي وَاتَّبَعُوا مَن لَّمْ يَزِدْهُ مَالُهُ وَوَلَدُهُ إِلَّا خَسَارًا ﴿٢١﴾

**नूहने म्हटले हे माझ्या पालनकर्त्या! या लोकांनी माझा तर आज्ञाभंग केला [१] आहे आणि अशाचे आज्ञापालन केले, ज्यांच्या धनसंपत्तीने आणि संततीने त्यांना (खचित्च) नुकसानांत पोहचविले आहे. [२] (२१)**

وَمَكَرُوا مَكْرًا كُبَّارًا ﴿٢٢﴾

**आणि त्यांनी माझ्याशी मोठमोठे डांवपेच केले. [३] (२२)**

وَقَالُوا لَا تَذَرُنَّ آلِهَتَكُمْ وَلَا تَذَرُنَّ وَدًّا وَلَا سُوَاعًا ۙ وَلَا يَغُوثَ وَيَعُوقَ وَنَسْرًا ﴿٢٣﴾

**आणि ते म्हणाले की, तुम्ही आपल्या उपास्यास (दैवास) अजीबात सोडू नका. आणि न वद्द व सुवाअ आणि यगुस व यऊक आणि नसरला, [४] (सोडणे) (२३)**

وَقَدْ أَضَلُّوا كَثِيرًا ۖ وَلَا تَزِدِ الظَّالِمِينَ إِلَّا ضَلَالًا ﴿٢٤﴾

**आणि त्यांनी पुष्कळशा लोकांना बहकवून टाकले आहे. [५] (या अल्लाह!) तू या जालीम लोकांचे बहकविणे आणखी वाढव (२४)**

مِّمَّا خَطِيئَاتِهِمْ أُغْرِقُوا فَأُدْخِلُوا نَارًا ۙ فَلَمْ يَجِدُوا لَهُم مِّن دُونِ اللَّهِ أَنصَارًا ﴿٢٥﴾

**हे लोक आपल्या पातकांमुळे बुडवून दिले गेले; आणि नरकाग्नीत पोहचवून दिले गेले; आणि अल्लाहशिवाय कोणी मददगार पण त्यांना मिळाले नाहीत. (२५)**

وَقَالَ نُوحٌ رَّبِّ لَا تَذَرْ عَلَى الْأَرْضِ مِنَ الْكَافِرِينَ دَيَّارًا ﴿٢٦﴾

**आणि (ह.) नूहने म्हटले हे माझ्या पालनकर्त्या! तू जमिनीच्या पृष्ठावर कोण्या काफिराला राहण्या सवरण्याला सोडू नकोस [६] (२६)**

إِنَّكَ إِن تَذَرْهُمْ يُضِلُّوا عِبَادَكَ وَلَا يَلِدُوا إِلَّا فَاجِرًا كَفَّارًا ﴿٢٧﴾

**जर तू त्यांना सोडून देशील, तर (खचित्च) ते तुझ्या आणखी सेवकांना सुद्धा बहकवून टाकतील. आणि त्यांना जी मुले बाळे होतील ती सुद्धा दुराचरणी काफिर होतील. (२७)**

१) म्हणजे माझ्या आज्ञाभंगावर अडून आहेत आणि आवाहनाला प्रतिसाद देत नाहीत.

२) म्हणजे त्यांच्या लहान लोकांनी आपल्या मोठ्या आणि सुखसंपन्न लोकांचेच अनुकरण केले; ज्यांच्या धनदौलतीने आणि संततीने त्यांना इहलोक आणि परलोकाच्या घाट्यांतच पुढे वाढविले आहे.

३) ही फसवणूक काय होती ? असे म्हणतात, त्यांचे काही लोकांना ह.नूह عليه السلام ला ठार करण्यासाठी तयार करणे होते. काही म्हणतात धनसंपत्ती आणि संततीमुळे ज्या फसवणुकीला ते बळी पडले, येथपावेतो की, काहींनी म्हटले, जर ते सत्त्यावर नसते तर त्यांना या देणग्या का प्राप्त झाल्या असत्या? आणि काहींच्या जवळ त्यांच्या मोठ्यांचे हे म्हणणे होते की, तुम्ही आपल्या उपास्यांची उपासना सोडू नका. काहींच्या जवळ त्यांचे कुफ्रच मोठी फसवणूक होती.

४) हे नूहच्या लोकांचे पाच पुण्यवान लोक होते, ज्यांची ते उपासना करीत असत. आणि त्यांची एवढी प्रसिद्धी झाली की, अरबमध्ये सुद्धा त्यांची पूजापाठ होत राहिली. हे पांची नूहच्या लोकांच्या सदाचरणी माणसांची नांवे होती; जेव्हा हे मरण पावले, तेव्हा शैतानाने त्यांच्या श्रद्धावंतांना म्हटले, त्यांची चित्रे बनवून तुम्ही त्यांना आपल्या घरांत आणि दुकानांत लावा. कारण की, त्यांचे स्मरण ताजे रहावे. आणि त्यांच्या आठवणीने तुम्ही सुद्धा त्यांच्यासारखे पुण्य करीत रहावे. जेव्हा हे चित्र बनवून ठेवणारे मरण पावले. तेव्हा शैतानाने त्यांच्या वंशजांना हे सांगून शिर्कमध्ये व्यस्त करून टाकले की तुमचे वाडवडील तर त्यांची उपासना करीत होते. ज्यांची चित्रे तुमच्या घरांत टांगलेली आहेत. म्हणून त्यांनी त्यांची पुजा सुरु करून दिली. (स.बुखारी, तफसीर सू.नूह)

५) म्हणजे त्यांनी पुष्कळशा लोकांना बहकवून टाकले. याचा अर्थ होईल की, यांच्यामुळे बहुतेक लोक बहकविले गेले. जसे ह.इब्राहीम عليه السلام नी पण म्हटले होते. ''हे माझ्या पालनकर्त्या! यांनी पुष्कळशा लोकांना सन्मार्गाहून भटकवून दिले आहे.'' (सू.इब्राहीम-३६)

६) हा शाप आहे, त्यावेळचा जेव्हा ह.नूह عليه السلام त्यांच्या ईमान आणण्यापासून फारच निराश होऊन गेलेत. आणि अल्लाहने पण (त्यांना) सूचना देऊन दिली की, आता त्यांच्यातून कोणी ईमान आणणार नाही. (सू.हूद-३६)

رَبِّ اغْفِرْ لِيْ وَلِوَالِدَيَّ وَلِمَنْ دَخَلَ بَيْتِيَ مُؤْمِنًا وَّلِلْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ ؕ وَلَا تَزِدِ الظّٰلِمِيْنَ اِلَّا تَبَارًا ﴿٢٨﴾

हे माझ्या पालनकर्त्या! तू मला आणि माझ्या आईबापास, आणि जो कोणी ईमानवाला होऊन माझ्या घरात येईल, आणि सर्व ईमानवाल्या पुरूषांना आणि सर्व ईमानवाल्या स्त्रियांना क्षमा कर. (१) आणि काफिरांना ऱ्हास होण्याशिवाय आणखी कोण्या गोष्टीत वाढवू नकोस! (२) २८

## (७२) सू. अल-जिन्न

महावाक्ये २८ — रुकूअ २

سُوْرَةُ الْجِنِّ مَكِّيَّةٌ (٧٢) (٤٠) اٰيَاتُهَا ٢٨ رُكُوْعَاتُهَا ٢

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

قُلْ اُوْحِيَ اِلَيَّ اَنَّهُ اسْتَمَعَ نَفَرٌ مِّنَ الْجِنِّ فَقَالُوْٓا اِنَّا سَمِعْنَا قُرْاٰنًا عَجَبًا ﴿١﴾

(हे.मुहम्मद सल्ल.) आपण सांगून द्या की, मला वह्य केले गेले आहे की, जिन्नातांतून एका समूहाने (३) (कुरआन) ऐकीले. आणि म्हटले की, आम्ही विलक्षण कुरआन ऐकिले आहे. (४) १

يَّهْدِيْٓ اِلَى الرُّشْدِ فَاٰمَنَّا بِهٖ ؕ وَلَنْ نُّشْرِكَ بِرَبِّنَآ اَحَدًا ﴿٢﴾

की जे सन्मार्ग दाखविते; (५) आम्ही तर त्यावर ईमान आणून चुकलो. (६) (आता) आम्ही कोणालाही आपल्या पालनकर्त्याचा (७) मुळीच सरकतदार बनविणार नाही. २

وَّاَنَّهُ تَعٰلٰى جَدُّ رَبِّنَا مَا اتَّخَذَ صَاحِبَةً وَّلَا وَلَدًا ﴿٣﴾

आणि नि:संशय आमच्या पालनकर्त्याची थोरवी अत्युच्च आहे. त्याने ना पत्नी बनविली आहे न संतती. (८) ३

وَّاَنَّهُ كَانَ يَقُوْلُ سَفِيْهُنَا عَلَى اللّٰهِ شَطَطًا ﴿٤﴾

आणि खचित्‌च आमच्यातून काही मुर्खांनी अल्लाहकडे खोट्या गोष्टी लावून दिल्या आहेत. (९) ४

وَّاَنَّا ظَنَنَّآ اَنْ لَّنْ تَقُوْلَ الْاِنْسُ وَالْجِنُّ عَلَى اللّٰهِ كَذِبًا ﴿٥﴾

आणि आम्ही असेच समजत राहिलो की हे अशक्य आहे की, मनुष्ये आणि जिन्नात अल्लाहवर खोट्या गोष्टी लावतील. (१०) ५

وَّاَنَّهُ كَانَ رِجَالٌ مِّنَ الْاِنْسِ يَعُوْذُوْنَ بِرِجَالٍ مِّنَ الْجِنِّ فَزَادُوْهُمْ رَهَقًا ﴿٦﴾

गोष्ट अशी आहे की काही माणसे काही जिन्नातांचा आश्रय धरीत होती. (११) ज्यामुळे जिन्नात आपल्या शिरजोरीत आणखी वाढून गेले. (१२) ६

وَّاَنَّهُمْ ظَنُّوْا كَمَا ظَنَنْتُمْ اَنْ لَّنْ يَّبْعَثَ اللّٰهُ اَحَدًا ﴿٧﴾

आणि (मानवांनी) सुद्धा तुमच्या जिन्नातांप्रमाणे तर्क करून घेतला होता की, अल्लाह कोणाला पाठविणार नाही. (किंवा कोणाला दुसऱ्यांदा जिवंत करणार नाही) (१३) ७

وَّاَنَّا لَمَسْنَا السَّمَآءَ فَوَجَدْنٰهَا مُلِئَتْ حَرَسًا شَدِيْدًا وَّشُهُبًا ﴿٨﴾

आणि आम्ही आकाशाला चांचपडून पाहिले तर त्याला कडक पहारेकरी आणि कडक ज्वालांनी भरलेले पावलो. (१४) ८

وَّاَنَّا كُنَّا نَقْعُدُ مِنْهَا مَقَاعِدَ لِلسَّمْعِ ؕ فَمَنْ يَّسْتَمِعِ الْاٰنَ يَجِدْ لَهٗ شِهَابًا رَّصَدًا ﴿٩﴾

याच्यापूर्वी आम्ही गोष्ट ऐकण्यासाठी आकाशामध्ये जागोजागी बसून जात असू. (१५) आता जो पण कान लावतो तो एक ज्वाला (उल्का) आपल्या पाळतीत पावतो. (१६) ९

وَّاَنَّا لَا نَدْرِيْٓ اَشَرٌّ اُرِيْدَ بِمَنْ فِي الْاَرْضِ اَمْ اَرَادَ بِهِمْ رَبُّهُمْ رَشَدًا ﴿١٠﴾

आम्ही जाणित नाही की, पृथ्वीवाल्यांसाठी वाईटाचा विचार केला गेला आहे किंवा त्यांच्या पालनकर्त्याचा इरादा त्यांच्याबरोबर भलाईचा आहे. (१७) १०

१) काफिरांकरीता शाप दिला तर आपल्यासाठी आणि ईमानवाल्यांसाठी क्षमायाचनेची प्रार्थना केली.

२) हा शाप कयामतपर्यंत येणाऱ्या जालिमांसाठी आहे. ज्याप्रमाणे सदरील दुआ तमाम ईमानवाले पुरूष आणि तमाम ईमानवाल्या स्त्रियांकरीता आहे.

३) ही घटना सू.अहकाफ-२९ च्या समासावर येऊन चुकली आहे की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम, ''नखला वादीमध्ये'' सहाबा करामला फज्रची नमाज पढवत होते. तेव्हा काही जिन्नातांचे तेथून जाणे झाले. तेव्हा त्यांनी आपण

(ﷺ चे) कुरआन ऐकिले. ज्याचा त्यांच्यावर परिणाम झाला. येथे सांगण्यात येत आहे की, त्यावेळी जिन्नातांचे कुरआन ऐकणे आपल्या लक्षांत आले नाही. किंबहुना वह्यामार्फत आपणांस याची कल्पना दिली गेली.

४) अर्थ आहे की, आम्ही असे कुरआन ऐकले आहे जे सुंदर साहित्य शैली आणि सुबोध वाणी यांत फार विलक्षण आहे. किंवा उपदेशाच्या अनुषंगाने विचित्र आहे. किंवा बरकतीच्या दृष्टीने फारच आश्चर्यचकीत करणारे आहे. (फत्हुल कदीर)

५) हे कुरआनाचे दुसरे वैशिष्ट्य आहे की ते सन्मार्ग म्हणजे सत्य आणि पुण्याला स्पष्ट करते किंवा अल्लाहची ओळख करून देते.

६) म्हणजे आम्ही तर त्याला ऐकून, या गोष्टीला मान्य केले की, खरोखर हे अल्लाहची वाणी आहे. कोण्या माणसाची वाणी नाही. याच्यांत काफिरांची कानउघाडणी आणि त्यांना तंबी आहे. की जिन्न तर एका वेळी ऐकूनच या कुरआनावर ईमान घेऊन आले. थोडीशी महावाक्ये ऐकूनच त्यांचा कायापालट होऊन गेला. आणि ते हे पण समजून गेले की, ही कोण्या माणसाची बनवलेली वाणी नाही. परंतु मनुष्यांना, खास करून त्यांच्या सरदारांना या कुरआनापासून काही फायदा झाला नाही. वास्तविक पाहतां, नबी ﷺ च्या शुभ मुखाने, त्यांनी अनेकवेळा कुरआन ऐकले. याशिवाय आपण ﷺ सुद्धा त्यांच्यातूनच होते; आणि त्यांच्याच भाषेत आपण त्यांना कुरआन ऐकवत असत.

७) न त्याच्या सृष्टीतून, न आणखी कोण्या उपास्याला. यासाठी की तो आपल्या पालकत्वांत एकुलता एक आहे.

८) 'जद्दून' चा अर्थ महानता आणि शानचा आहे. म्हणजे आमच्या पालनकर्त्याची शान यापेक्षा फारच अत्युच्च आहे की, त्याला संतती किंवा पत्नी असावी. जणू जिन्नातांनी या मुशरिक लोकांच्या चुकीला स्पष्ट केले, जे अल्लाहकडे पत्नी किंवा संततीला संबंधीत करीत होते. त्यांनी या दोन्ही दुर्बलतेपासून आपला पालनकर्ता पवित्र असल्याचे जाहीर केले.

९) 'सफिहुना' (आमचे मूर्ख) ने काहींनी शैतान अभिप्रेत धरला आहे आणि काहींनी त्यांचे साथी जिन्नात. म्हणजे प्रत्येक तो मनुष्य जो निरर्थक तर्क करतो की, अल्लाहची संतती आहे. 'शतता' चे कित्येक अर्थ केले गेले आहेत. जुलूम,निरर्थक, असत्य, कुफ्र मध्ये खूप वाढून जाणे वगैरे, उद्देश्य, सन्मार्गापासून दूर जाणे, आणि मर्यादेचे उल्लंघन करणे आहे. अर्थ हा आहे की, ही गोष्ट की अल्लाहला संतती आहे, त्या मूर्खाची गोष्ट आहे, जे सन्मार्गापासून आणि पुण्यापासून दूर, मर्यादेचे उल्लंघन, आणि खोटे बोलणारे आणि कुभांड रचणारे आहेत.

१०) म्हणूनच आम्ही त्यांना मान्यता देत आलो; आणि अल्लाहच्या बाबतीत ही धारणा बाळगत आलो. येथपावेतो की आम्ही कुरआन ऐकिले, तेव्हा मग आमच्यावर धारणेचा खोटेपणा स्पष्ट झाला.

११) अज्ञानकाळांत, एक रुढी ही पण होती की, ते प्रवासाला कोठे जात तेव्हा ज्या प्रदेशांत ते मुक्काम करीत, तेथे जिन्नातांपासून आश्रय मागत. जसे इलाख्याच्या मोठ्या माणूस आणि श्रीमंताचा आश्रय मागितला जातो. इस्लामने याला संपवून टाकले. आणि फक्त एका अल्लाहचा आश्रय मागण्याची ताकीद केली.

१२) म्हणजे जेव्हा जिन्नातांनी हे पाहिले की, मनुष्ये आम्हास भितात आणि आमचा आश्रय मागतात; तेव्हा त्यांच्या शिरजोरी आणि अहंकारात आणखी वाढ होऊन गेली. 'रहका' येथे शिरजोरी, दांडगाई आणि गर्वाच्या भावार्थांत आहे. याचा मूळ अर्थ आहे गुन्हा आणि निषिद्ध कामांना झांकणे म्हणजे त्यावर अंमल करणे आहे.

१३) 'ब्अस' चे दोन्ही भावार्थ होऊं शकतात, जसे की भाषांतराने स्पष्ट आहे.

१४) म्हणजे आकाशांत देवदूत चौकीदारी करतात की, आकाशातील कोणी गोष्ट, आणखी कोणी ऐकून न घ्यावी आणि हे तारे आकाशावर जाणाऱ्या शैतानांवर ज्वाला (अंगारे) बनून पडतात.

१५) आणि आकाशांतील गोष्टींचे काही कुजबूज ऐकून भविष्य सांगणाऱ्यांना दाखवून देत असत. ज्याच्यांत ते आपल्याकडून शंभर असत्य गोष्टी मिळवून देत असत.

१६) परंतु ह.मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) च्या पैगंबर झाल्यानंतर, हा क्रम खंडीत करण्यांत आला. आतांजो पण या इरद्याने वर जातो, अंगारा त्याच्या शोधांतच असतो. आणि तुटून त्याच्यावर पडतो.

१७) म्हणजे या आकाशीय निगराणीने उद्देश्य, पृथ्वीवाल्यांना कोण्या वाईट गोष्टीच्या नियोजनाला पूर्णत्वाला पोहचविणे म्हणजे त्यांच्यावर शिक्षा सादर करणे किंवा भलाईचा इरादा म्हणजे पैगंबर पाठविणे.

وَّاَنَّا مِنَّا الصّٰلِحُوْنَ وَمِنَّا دُوْنَ ذٰلِكَ ۭ كُنَّا طَرَاۗىِٕقَ قِدَدًا ۝١١

**आणि हे की, आमच्यातून काही तर सदाचरणी आहेत आणि काही याच्या उलट सुद्धा आहेत. आम्ही निरनिराळ्या पंथाचे आहोत.[१] ⑪**

وَّاَنَّا ظَنَنَّآ اَنْ لَّنْ نُّعْجِزَ اللّٰهَ فِي الْاَرْضِ وَلَنْ نُّعْجِزَهٗ هَرَبًا ۝١٢

**आम्हास पूर्ण खात्री[२] होऊन गेली की, आम्ही अल्लाहतआलाला पृथ्वीत मुळीच विवश करू शकत नाही. आणि न आम्ही पळून जाऊन त्याला हरवू शकतो. ⑫**

وَّاَنَّا لَمَّا سَمِعْنَا الْهُدٰٓى اٰمَنَّا بِهٖ ۭ فَمَنْ يُّؤْمِنْۢ بِرَبِّهٖ فَلَا يَخَافُ بَخْسًا وَّلَا رَهَقًا ۝١٣

**आम्ही तर हिदायत ऐकताच त्यावर ईमान आणून चुकलो आणि जो पण आपल्या पालनकर्त्यावर ईमान आणेल त्याला न कोण्या नुकसानीचा अंदेशा आहे न जुलूम आणि अत्याचाराचा[३] ⑬**

وَّاَنَّا مِنَّا الْمُسْلِمُوْنَ وَمِنَّا الْقٰسِطُوْنَ ۭ فَمَنْ اَسْلَمَ فَاُولٰۗىِٕكَ تَحَرَّوْا رَشَدًا ۝١٤

**होय! आमच्यातून काही तर मुसलमान आहेत. आणि काही अन्यायी आहेत.[४] तर जे मुसलमान होऊन गेलेत, त्यांनी तर सरळ मार्ग शोधून काढला ⑭**

وَاَمَّا الْقٰسِطُوْنَ فَكَانُوْا لِجَهَنَّمَ حَطَبًا ۝١٥

**आणि जे जालीम आहेत, ते नरकाग्नीचे इंधन बनून गेलेत.[५] ⑮**

وَّاَنْ لَّوِ اسْتَقَامُوْا عَلَي الطَّرِيْقَةِ لَاَسْقَيْنٰهُمْ مَّاۗءً غَدَقًا ۝١٦

**आणि (अहो पैगंबरा! हे पण सांगून टाका की,) जर लोक सरळ मार्गावर कायम रहाते तर खचित्‌च आम्ही त्यांना रेलचेल पाणी पाजतो ⑯**

لِّنَفْتِنَهُمْ فِيْهِ ۭ وَمَنْ يُّعْرِضْ عَنْ ذِكْرِ رَبِّهٖ يَسْلُكْهُ عَذَابًا صَعَدًا ۝١٧

**कारण की आम्ही यांत त्यांना अजमाऊन घ्यावे;[६] आणि जो मनुष्य आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणाकडून तोंड फिरवेल, तर अल्लाहतआला त्याला कडक शिक्षेत नेऊन दाखल करीन.[७] ⑰**

१) म्हणजे आम्ही वेगवेगळ्या समूहात आणि वेगवेगळ्या प्रकारांत विभागलेले आहोत. अर्थ हा आहे की, जिन्नातांमध्ये सुद्धा, मुसलमान काफिर, यहूदी, खिस्ती, अग्नीपूजक, वगैरे आहेत. काही म्हणतात की, याच्यांत सुद्धा मुसलमानांप्रमाणे कद्‌रिया, मुरजीया आणि राफिजा वगैरे आहेत. (फत्‌हूल कदीर)

२) 'जन्न' येथे ज्ञान आणि खात्रीच्या अर्थांत आहे. जसे आणखी काही ठिकाणी आहे.

३) आणि न या गोष्टीचे भय आहे की, त्यांच्या पुण्याच्या प्रतिळांत काही कमी करून दिले जाईल आणि न या गोष्टीची भीती की त्यांच्या पापांत काही वाढ होऊन जाईल.

४) म्हणजे जो ह.मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) च्या पैगंबरीवर ईमान आणेल, तो मुसलमान आणि त्याला नाकारणारे अन्यायी आहेत.

५) याने ठाऊक झाले की, मनुष्यांप्रमाणे जिन्नांत सुद्धा नर्कात आणि स्वर्गांत, उभयतांत जाणार आहेत. याच्यांत जे काफिर असतील ते नरकाग्नीत आणि जे मुसलमान असतील ते स्वर्गांत जातील. येथपर्यंत जिन्नातांचे बोलणे संपले. आतांपुढे पुन्हा अल्लाहचे बोलणे आहे.

६) ............ 'अल्‌तरिकता' ने अभिप्रेत सन्मार्ग म्हणजे इस्लाम आहे. 'गद्‌कुन' चा अर्थ भरपूर, वाफर पाणी' याचा अर्थ ऐहिक सुखसंपन्नता आहे. म्हणजे ऐहिक धनदौलत आणि सारसरंजाम देऊन, आम्ही त्यांची कसोटी घेतली असती. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''आणि जर या वस्त्यांचे राहणारे, ईमान आणते आणि अल्लाहला भिते तर आम्ही त्यांच्यावर आकाश आणि पृथ्वीच्या बरकती उघडून दिल्या असत्या.'' (सू.आअराफ-९६) ''हीच गोष्ट ग्रंथधारी लोकांच्या संदर्भात पण सांगितली आहे.'' सू.माईद: - ६६. काही म्हणतात या महावाक्याचे अवतरण त्या वेळी झाले, जेव्हा मक्केच्या काफिरांवर दुष्काळ लादून देण्यांत आला होता. 'अल्‌तरीकता' चा दुसरा अर्थ बहकण्याच्या मार्गांचा केला गेला आहे. या अर्थाच्या अनुषंगाने ही भौतिक सुख संपन्नता नेहमीपेक्षा विरुद्ध असेल. जसे दुसऱ्या ठिकाणी सांगितले, ''मग जे ते त्या गोष्टींना विसरून गेले, ज्यांचा त्यांना उपदेश केला जात होता, तेव्हा आम्ही त्यांच्यावर प्रत्येक वस्तूंची द्वारे उघडून दिली'' (सू.अन्‌आम-४४)'' ''काय त्यांना असे वाटते कि आम्ही जी पण वाढ त्यांच्या संपत्तीत आणि संततीत, करीत आहोत; ती त्यांच्या भलाईत घाई करीत आहेत.'' (सू.अल्‌मोमिनुन-५५-५६)

७) फारच सक्त, दु:खदायक शिक्षा.

وَّ اَنَّ الْمَسٰجِدَ لِلّٰهِ فَلَا تَدْعُوْا مَعَ اللّٰهِ اَحَدًا ﴿١٨﴾

आणि हे की मशिदी फक्त अल्लाहच्याच आहेत. तर अल्लाहतआला बरोबर आणखी कोणाचा धांवा करू नका.[१] (१८)

وَّ اَنَّهٗ لَمَّا قَامَ عَبْدُ اللّٰهِ يَدْعُوْهُ كَادُوْا يَكُوْنُوْنَ عَلَيْهِ لِبَدًا ﴿١٩﴾

आणि जेव्हा अल्लाहचा सेवक त्याच्या उपासनेकरीता उभा राहिला. तर जवळच होते ते गर्दी करून त्याच्यावर तुटून पडते.[२] (१९)

قُلْ اِنَّمَاۤ اَدْعُوْا رَبِّیْ وَ لَاۤ اُشْرِكُ بِهٖۤ اَحَدًا ﴿٢٠﴾

आपण सांगून द्या की, मी तर फक्त आपल्या पालनकर्त्याचाच धांवा करतो आणि त्याच्या बरोबर कोणाला सरकतदार करीत नाही.[३] (२०)

قُلْ اِنِّیْ لَاۤ اَمْلِكُ لَكُمْ ضَرًّا وَّ لَا رَشَدًا ﴿٢١﴾

सांगून द्या की, मला तुमच्या कुठल्याही नफा नुकसानीचा (काहीही) अधिकार नाही.[४] (२१)

قُلْ اِنِّیْ لَنْ یُّجِیْرَنِیْ مِنَ اللّٰهِ اَحَدٌ ۙ۬ وَّ لَنْ اَجِدَ مِنْ دُوْنِهٖ مُلْتَحَدًا ﴿٢٢﴾

सांगून द्या की, मला मुळीच कोणी अल्लाहपासून वांचवू शकत नाही.[५] आणि मी मुळीच त्याच्या शिवाय कोणाचा आश्रय मिळवूंशकत नाही (२२)

اِلَّا بَلٰغًا مِّنَ اللّٰهِ وَ رِسٰلٰتِهٖ ؕ وَ مَنْ یَّعْصِ اللّٰهَ وَ رَسُوْلَهٗ فَاِنَّ لَهٗ نَارَ جَهَنَّمَ خٰلِدِیْنَ فِیْهَاۤ اَبَدًا ﴿٢٣﴾

तथापि (माझे काम) अल्लाहची गोष्ट आणि त्याचे संदेश (लोकांना) पोहचवून देणे आहे.[६] आता जो सुद्धा अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे मानणार नाही, त्याच्या करीता नरकाग्नीची आग आहे. ज्यात तो नित्य निरंतर राहील. (२३)

حَتّٰۤى اِذَا رَاَوْا مَا یُوْعَدُوْنَ فَسَیَعْلَمُوْنَ مَنْ اَضْعَفُ نَاصِرًا وَّ اَقَلُّ عَدَدًا ﴿٢٤﴾

(त्यांचे डोळे उघडणार नाहीत,) जोपर्यंत की तिला पाहून घेईल, जिचा त्यांचेशी वायदा केला जात आहे.[७] तर लवकरच हे जाणून घेतील की, कोणाचा मददगार दुर्बल, आणि कोणाचा समूह कमी आहे.[८] (२४)

قُلْ اِنْ اَدْرِیْۤ اَقَرِیْبٌ مَّا تُوْعَدُوْنَ اَمْ یَجْعَلُ لَهٗ رَبِّیْۤ اَمَدًا ﴿٢٥﴾

आपण सांगून द्या की, मला ठाऊक नाही की, ज्याचा वायदा तुम्हाशी केला जात आहे ते जवळ आहे किंवा माझा पालनकर्ता, त्याच्यासाठी अमुक एक काळ निश्चित करून देईल.[९] (२५)

عٰلِمُ الْغَیْبِ فَلَا یُظْهِرُ عَلٰى غَیْبِهٖۤ اَحَدًا ﴿٢٦﴾

तो अदृष्टाचा ज्ञाता आहे. आणि आपल्या अदृष्ट गोष्टी तो कोणाला जाहीर करीत नसतो. (२६)

اِلَّا مَنِ ارْتَضٰى مِنْ رَّسُوْلٍ فَاِنَّهٗ یَسْلُكُ مِنْۢ بَیْنِ یَدَیْهِ وَ مِنْ خَلْفِهٖ رَصَدًا ﴿٢٧﴾

शिवाय त्या पैगंबराच्या, ज्याला तो पसंत करील.[१०] परंतु त्यांच्याही मागे पुढे, आपले पहारेकरी ठेवून देतो.[११] (२७)

لِّیَعْلَمَ اَنْ قَدْ اَبْلَغُوْا رِسٰلٰتِ رَبِّهِمْ وَ اَحَاطَ بِمَا لَدَیْهِمْ وَ اَحْصٰى كُلَّ شَیْءٍ عَدَدًا ﴿٢٨﴾

कारण की त्याने जाणून घ्यावे[१२] की, लोकांना आपल्या पालनकर्त्याचे संदेश पोहचवून दिले आहेत. अल्लाहतआलाने त्यांच्या इर्द गिर्द (च्या वस्तूंना) घेरून ठेवले आहे[१३] आणि त्याने प्रत्येक वस्तूची गणती करून ठेवली आहे.[१४] (२८)

१) मशिदीचा अर्थ सजदा करण्याची जागा असा आहे. सजदा पण एक नमाजीचे अंग आहे. म्हणून नमाज पढण्याच्या जागेला मशीद म्हणतात. महावाक्याचा अर्थ स्पष्ट आहे की, मशीदींचा उद्देश्य फक्त एका अल्लाहची उपासना (करणे) आहे. म्हणून मशीदींमध्ये, आणखी कोणाची उपासना, आणखी कोणाजवळ मागणे आणि विनविणी करणे, आणखी कोणाजवळ दाद मागणे, मदत मागणे, योग्य नाही. ही कामे तशी तर पूर्णपणे मना आहेत. आणि कोठेसुद्धा, अल्लाहशिवाय इतरांची उपासना करणे योग्य नाही. परंतु मशीदींचा विशेष म्हणून यासाठी उल्लेख केला की, यांना कायम करण्याचा उद्देश्यच अल्लाहची उपासना करणे हा आहे. जर येथे सुद्धांअल्लाहशिवाय इतरांचा धांवा करणे सुरू करून दिले, तर हे फारच घृणास्पद आणि अन्यायकारी काम होईल. परंतु दुर्दैवाने नामधारी मुसलमान, आता मशीदीत सुद्धा, अल्लाह बरोबर दुसऱ्यांना सुद्धा मदतीकरता बोलावितात. किंबहुना मशीदीत अशा कबरी उभारलेल्या आहेत, ज्यावर अल्लाहच्याशिवाय इतरांजवळ मदत मागीतली जाते.

२) अब्दुल्लाह्ने अभिप्रेत रसूलुल्लाह् सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत; आणि अर्थ आहे की, मनुष्ये आणि जिन्नांत मिळून इच्छितात की, अल्लाहच्या या प्रकाशाला आपल्या फुंकरींनी विझवून टाकावे. याचे आणखी पण भावार्थ केले गेले आहेत. परंतु इमाम इब्ने कसीरने यालाच योग्य ठरविले आहेत.
३) म्हणजे जेव्हा सर्व आपल्या शत्रुत्वावर एकत्रित होऊन गेलेत. विरोधांत जमून गेले आहेत. तर आपण सांगून टाका की, मी तर फक्त आपल्या पालनकर्त्याची उपासना करतो. त्याचाच आश्रय मागतो आणि त्याच्यावरच भरोसा ठेवतो.
४) म्हणजे मला तुमची हिदायत किंवा बहकणे किंवा कोण्या नफ्या नुकसानाचा अधिकार नाही. मी तर निव्वळ त्याचा एक सेवक आहे; ज्याला वह्य आणि पैगंबरी करता निवडून घेण्यांत आले आहे.
५) जर मी त्याचा आज्ञाभंग करेल, आणि त्यावर तो मला शिक्षा करू इच्छील.
६) म्हणजे अल्लाहपासून कोणी गोष्ट वांचवू शकत असेल, तर ती हीच आहे की, धर्मप्रचार आणि पैगंबरीची कर्तव्ये (मी) पार पाडावीत. ज्याची अंमलबजावणी अल्लाहने माझ्यावर आवश्यक केली आहे.
७) किंवा अर्थ हा आहे की, ''नबी ﷺ आणि ईमानवाल्यांशी शत्रुत्व, आणि आपल्या कुफ्रवर अडून राहाल, येथपावेतो की, इहलोकांत आणि परलोकांत ती शिक्षा पाहून घेतील, जिचा त्यांच्याशी वायदा केला जात आहे.
८) म्हणजे त्यावेळी त्यांना ठाऊक होईल की, ईमानवाल्यांचा मददगार दुर्बल आहे का मुशरिकांचा? आणि एकेश्वरवाद्यांची संख्या कमी आहे की अल्लाहशिवाय इतरांच्या पुजाऱ्यांची? अर्थ हा आहे की मग मुश्रिकांचा सुरवातीपासूनच कोणी मददगार असणार नाही आणि अल्लाहच्या मोजता न येणाऱ्या लष्कराच्या मुकाबल्यांत त्या मुशरिकांची संख्या सुद्धा पीठांत मीठा एवढी असेल.
९) अर्थ हा आहे की, शिक्षा किंवा कयामतचे ज्ञान, हे अदृष्टाशी संबंधीत आहे; ज्याला फक्त अल्लाहतआलाच जाणतो. की ती जवळ आहे की दूर?
१०) म्हणजे आपल्या पैगंबराला काही अदृष्टांच्या गोष्टींनी सूचित करून देतो. ज्यांचा संबंध एक तर त्याच्या पैगंबरीच्या कर्तव्याशी असतो किंवा त्याच्या पैगंबरीच्या सत्त्यतेचे प्रमाण असते आणि उघड गोष्ट आहे की, अल्लाहच्या सूचित करून देण्याने, पैगंबर अदृष्टाचा ज्ञाता होऊ शकत नाही. कारण की, जर पैगंबर पण अदृष्टाचा ज्ञाता असता, तर मग त्याच्यावर अल्लाहकडून अदृष्टाच्या जाहीर करण्याला काही अर्थच राहीला नसतां. अल्लाहतआला आपल्या अदृष्टाला जाहीर त्याच वेळी आणि त्याच पैगंबरावर करतो, ज्याला पूर्वीपासून या अदृष्टाचे ज्ञान नसते. म्हणून अदृष्टाला जाणणारे फक्त अल्लाहचेच व्यक्तीत्व आहे. जसा की येथेपण याचा खुलासा करण्यांत आला आहे.
११) म्हणजे वह्यच्या अवतरण्याच्या वेळेस पैगंबराच्या मागे पुढे देवदूत असतात. जे शैतान आणि जिन्नातांना वह्यच्या गोष्टी ऐकू देत नाहीत.
१२) 'लियअलम्' मध्ये जमीरचा मर्जा कोण आहे? काहींच्या जवळ रसूलुल्लाह ﷺ आहेत. कारण की आपण समजून घ्यावे की, आपल्या पूर्वीच्या पैगंबरांनी सुद्धा, अल्लाहचा संदेश अशाच प्रकारे पोहचविला, ज्याप्रमाणे आपण पोहचविला. किंवा निगराणी करणाऱ्या देवदुतांनी आपल्या पालनकर्त्याचा संदेश पैगंबरापर्यंत पोहचवून दिला आणि काहींनी याचा मर्जा अल्लाहला बनविले आहे. या स्वरुपांत अर्थ होईल, अल्लाहतआला आपल्या पैगंबरांच्या देवदूतांमार्फत संरक्षण करीत असतो; कारण की त्यांनी पैगंबराच्या कर्तव्याची चांगल्या प्रकारे अंमलबजावणी करु शकावी. तसेच तो या वह्याचे पण संरक्षण करतो, जे पैगंबराकडे केले जाते. कारण की त्यांनी जाणून घ्यावे की, त्यांनी आपल्या पालनकर्त्याचे संदेश लोकांपर्यंत ठीक ठीक पोहचवून दिले आहेत. किंवा देवदूतांनी पैगंबरापर्यंत वहय पोहचून दिली आहे. अल्लाहतआलाला तर पूर्वीपासूनच प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे.
१३) देवदूतांच्या जवळची किंवा पैगंबरांच्या जवळची.
१४) कारण की तोच अदृष्टाचा ज्ञाता आहे. जे होऊन चुकले आणि जे पुढे होईल, सर्व त्याने मोजून ठेवले आहे. म्हणजे त्याच्या ज्ञानांत आहे.

رکوعاتها ٢ (٧٣) سُوْرَةُ الْمُزَّمِّلِ مَكِّيَّةٌ (٣) اٰیاتها ٢٠

# (७३) सू. अल-मुज़्ज़म्मिल

महावाक्ये २० | रुकूअ २

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

يٰٓاَيُّهَا الْمُزَّمِّلُ ۙ﴿۱﴾

हे कांबळी पांघरणाऱ्या[१] ①

قُمِ الَّيْلَ اِلَّا قَلِيْلًا ۙ﴿۲﴾

रात्रीला (नमाजीसाठी) उभे राहत जा, परंतु थोडे ②

نِّصْفَهٗٓ اَوِ انْقُصْ مِنْهُ قَلِيْلًا ۙ﴿۳﴾

अर्धी रात्र किंवा तिच्यातून पण काही कमी करीत जा ③

اَوْ زِدْ عَلَيْهِ وَ رَتِّلِ الْقُرْاٰنَ تَرْتِيْلًا ۭ﴿۴﴾

किंवा काही वाढवित जा.[२] आणि कुरआनाला थांबून थांबून (स्पष्ट) पठण करीत जा[३] ④

اِنَّا سَنُلْقِيْ عَلَيْكَ قَوْلًا ثَقِيْلًا ﴿۵﴾

खचित्‌च आम्ही तुझ्यावर लवकरच एक फार भारी गोष्ट अवतरीत करणार आहोत.[४] ⑤

اِنَّ نَاشِئَةَ الَّيْلِ هِيَ اَشَدُّ وَطْـاً وَّاَقْوَمُ قِيْلًا ۭ﴿۶﴾

नि:संशय रात्रीचे उठणे फार जिकीरीचे असते[५] आणि गोष्टीला फारच दुरुस्त करून देते.[६] ⑥

اِنَّ لَكَ فِي النَّهَارِ سَبْحًا طَوِيْلًا ۭ﴿۷﴾

खचित्‌च तू दिवसांत फारच व्यस्त[७] राहतोस. ⑦

१) ज्यावेळी या महावाक्यांचे अवतरण झाले. नबी ﷺ चादर ओढून झोपलेले होते. अल्लाहने आपल्या या स्थितीला वर्णन करीत, संबोधित केले. अर्थ आहे की, आता चादर सोडून रात्री थोडे जागरण करावे. म्हणजे तहज्जुद ची नमाज पढावी. असे म्हणतात की, या हुकुमाच्या आधारावर तहज्जुद ची नमाज आपल्यासाठी आवश्यक (वाजीब) होती. (इब्ने कसीर)

२) हे 'कलीलन' चे बदल आहे. म्हणजे हे उभे रहाणे, अर्ध्या रात्रीपेक्षा थोडे कमी (१/३) किंवा थोडे जास्त (२/३) होईल तर काही हरकत नाही.

३) म्हणून हदीर्शीमध्ये येते आपण ﷺ ची किराअत थांबून थांबून होत असे. आणि आपण आपल्या उम्मतला सुद्धांथांबून थांबून पढण्याची ताकीद केली आहे.

४) रात्रीचे नमाजीत उभे रहाणे कारण की मनुष्याच्या मनोकामनेला जेर करते. म्हणून पुढे सांगितले की आम्ही यापेक्षा सुद्धा भारी गोष्ट तुझ्यावर अवतरीत करणार आहोत. म्हणजे कुरआन ज्याचे आदेश आणि कर्तव्ये यावर अंमलबजावणी, त्याच्या मर्यादांचे पालन आणि त्याचा प्रचार आणि प्रसार, एक भारी आणि मनावर जड असे कर्म आहे. काहींनी जडत्वने ते ओझे अभिप्रेत धरले आहे, जे वह्याच्या वेळी, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमवर पडत असे. ज्यामुळे कडक थंडीमध्ये सुद्धा आपण घामाघुम होऊन जात.

५) याचा दुसरा भावार्थ आहे की, रात्रीच्या एकांतात, कान, कुरआनाचा अर्थ आणि भावार्थ यांच्या अनुकुलतेला मन साथ देते जो एक नमाजी तहज्जुद मध्ये पढतो.

६) दुसरा भावार्थ आहे की, दिवसाच्या तुलनेत, रात्रीला कुरआन जास्त स्पष्ट आणि अंत:करणाला लक्षणारे जास्त परिणामकारक असते. यासाठी की, यावेळी दुसरे आवाज स्तब्ध असतात. वातावरणात शांतता असते. यावेळी नमाजी जे पढतो तो आवाजांचा गोंधळ आणि दुनियाचा गोंगाट याच्यांत नष्ट होत नाही. किंबहुना नमाजी यापासून फार आनंदित होतो. याच्या परिणामकारकतेची त्याला जाणीव होते.

७) 'सबहुन' चा अर्थ आहे. चालणे फिरणे. म्हणजे दिवसा दुनियाच्या व्यस्ततेची गर्दी रहाते. हे पहिल्या गोष्टीचे समर्थन आहे. म्हणजे रात्रीला कुरआन आणि नमाज जास्त फायदेकारक आणि परिणामकारक असते. म्हणजे हे नेहमी करीत रहा.

وَاذْكُرِ اسْمَ رَبِّكَ وَتَبَتَّلْ إِلَيْهِ تَبْتِيلًا ۝٨

**तू आपल्या पालनकर्त्याच्या नावाचे स्मरण करीत रहा. आणि त्याच्याचकडे एकाग्र होऊन जा.[१] (८)**

رَبُّ الْمَشْرِقِ وَالْمَغْرِبِ لَا إِلٰهَ إِلَّا هُوَ فَاتَّخِذْهُ وَكِيلًا ۝٩

**पूर्व आणि पश्चिमेचा पालनकर्ता, ज्याच्या वांचून अन्य कोणी उपास्य नाही. तू त्यालाच आपला कर्ताहर्ता बनवून घे. (९)**

وَاصْبِرْ عَلٰى مَا يَقُولُونَ وَاهْجُرْهُمْ هَجْرًا جَمِيلًا ۝١٠

**आणि ते जे काही म्हणतात तू सहन करीत रहा. आणि त्यांना चांगल्या प्रकारे सोडून दे ! (१०)**

وَذَرْنِي وَالْمُكَذِّبِينَ أُولِي النَّعْمَةِ وَمَهِّلْهُمْ قَلِيلًا ۝١١

**आणि मला आणि या खोटे ठरवणाऱ्या सुखसंपन्न लोकांना सोडून दे; आणि तू त्यांना थोडासा अवकाश दे (११)**

إِنَّ لَدَيْنَا أَنْكَالًا وَجَحِيمًا ۝١٢

**नि:संशय आमच्याजवळ सक्त बेड्या आहेत. आणि धगधगणारी नरकाग्नी आहे. (१२)**

وَطَعَامًا ذَا غُصَّةٍ وَعَذَابًا أَلِيمًا ۝١٣

**आणि घशांत अडकणारे अन्न आहे, आणि दु:खदायक[२] शिक्षा आहे. (१३)**

يَوْمَ تَرْجُفُ الْأَرْضُ وَالْجِبَالُ وَكَانَتِ الْجِبَالُ كَثِيبًا مَهِيلًا ۝١٤

**ज्या दिवशी जमीन आणि पर्वत थरथर हलू लागतील, आणि पर्वत भुरभुरीत वाळूच्या टेकड्यांसारखे होऊन जातील.[३] (१४)**

إِنَّا أَرْسَلْنَا إِلَيْكُمْ رَسُولًا شَاهِدًا عَلَيْكُمْ كَمَا أَرْسَلْنَا إِلٰى فِرْعَوْنَ رَسُولًا ۝١٥

**नि:संशय आम्ही तुम्हाकडे सुद्धा, तुमच्यावर साक्ष देणारा.[४] पैगंबर पाठवून दिला. जसे की, आम्ही फिरऔनाजवळ पैगंबर पाठविला होता. (१५)**

فَعَصٰى فِرْعَوْنُ الرَّسُولَ فَأَخَذْنٰهُ أَخْذًا وَبِيلًا ۝١٦

**तर फिरऔनाने त्या पैगंबराचा आज्ञाभंग केला म्हणून आम्ही त्याला सक्त शिक्षेत पकडले.[५] (१६)**

فَكَيْفَ تَتَّقُونَ إِنْ كَفَرْتُمْ يَوْمًا يَجْعَلُ الْوِلْدَانَ شِيبًا ۝١٧

**जर तुम्ही काफिर (च) राहिलात, तर त्या दिवसापासून कसे वाचू शकाल ? जो दिवस मुलांना वृद्ध (म्हतारे) करून टाकील.[६] (१७)**

१) 'तबत्तुल' चा अर्थ सर्वांकडून अलिप्त होणे आहे. म्हणजे अल्लाहची उपासना याच्या दुआ विनविण्या करण्याकरीता एकाग्र होऊन त्याच्याकडे वळून जाणे. ही सन्यासाहून वेगळी गोष्ट आहे. सन्यास तर या दुनियेला तर्क करून देणे आहे. जी इस्लाममध्ये नापसंत गोष्ट आहे. आणि तबत्तुलचा अर्थ आहे, ऐहिक कामे बजावून आणण्याबरोबरच, उपासनेमध्ये ध्यानमग्नता, व्याकुळता, आणि विनवण्या करणे आणि अल्लाहकडे एकाग्रता करणे. हे प्रसंशनीय आणि वांच्छनीय आहे.

२) 'अन्‌काल' नकलचे अनेकवचन आहे. कयुद (बेड्या) काहींनी मानखोड्याच्या अर्थांत घेतले आहे. म्हणजे मानखोडा. जहीमन्, धगधगीत आग. 'जा गुस्सतिन्' घशांत अडकून जाणारे, न घशाखाली उतरेल न बाहेर निघेल. हे निवडूंग किंवा काट्याचे खाणे असेल 'जरीअ' एक कांटेदार झुडूप आहे. जी फारच दुर्गंधयुक्त आणि विषारी असते.

३) म्हणजे ही शिक्षा त्या दिवशी होईल, ज्यादिवशी जमीन व पर्वत भूकंपाने तहस नहस होऊन जातील. मोठे मोठे हैबत बसविणारे पर्वत, वाळूच्या टेकड्यांप्रमाणे भुसभुशीत होऊन जातील. 'कसीब' वाळूची टेकडी. 'महिलन', भुसभुशीत, पायाखालून सरकून जाणारी वाळू.

४) हे कयामतच्या दिवशी तुमच्या कर्मांची साक्ष देतील.

५) यांत मक्केवाल्यांना तंबी आहे, की तुमचा पण शेवट तोंच होऊ शकतो जो फिरऔनाचा ह.मूसा عليه السلام ला खोटे ठरवण्याने झाला.

६) 'शिबुन' 'अश्यब', चे अनेकवचन आहे. कयामतच्या दिवशी, कयामतच्या भयानकतेने, खरोखर बालके म्हातारी होऊन जातील. किंवा उपमा देण्यासाठी म्हणून असे सांगण्यात आले आहे.

اِلسَّمَآءُ مُنْفَطِرٌۢ بِهٖ ۭ كَانَ وَعْدُهٗ مَفْعُوْلًا ⑱

ज्या दिवशी आकाश फाटून [१] जाईल, अल्लाहतआलाचा हा वायदा होऊनच राहणार आहे. [२] १८

اِنَّ هٰذِهٖ تَذْكِرَةٌ ۚ فَمَنْ شَآءَ اتَّخَذَ اِلٰى رَبِّهٖ سَبِيْلًا ⑲ ع ١٩ ١٣

नि:संशय हा उपदेश आहे, तर जो इच्छील आपल्या पालनकर्त्याकडे मार्ग पत्करील. १९

اِنَّ رَبَّكَ يَعْلَمُ اَنَّكَ تَقُوْمُ اَدْنٰى مِنْ ثُلُثَيِ الَّيْلِ وَنِصْفَهٗ وَثُلُثَهٗ وَطَآئِفَةٌ مِّنَ الَّذِيْنَ مَعَكَ ۭ وَاللّٰهُ يُقَدِّرُ الَّيْلَ وَالنَّهَارَ ۭ عَلِمَ اَنْ لَّنْ تُحْصُوْهُ فَتَابَ عَلَيْكُمْ فَاقْرَءُوْا مَا تَيَسَّرَ مِنَ الْقُرْاٰنِ ۭ عَلِمَ اَنْ سَيَكُوْنُ مِنْكُمْ مَّرْضٰى ۙ وَاٰخَرُوْنَ يَضْرِبُوْنَ فِي الْاَرْضِ يَبْتَغُوْنَ مِنْ فَضْلِ اللّٰهِ ۙ وَاٰخَرُوْنَ يُقَاتِلُوْنَ فِيْ سَبِيْلِ اللّٰهِ ڮ فَاقْرَءُوْا مَا تَيَسَّرَ مِنْهُ ۙ وَاَقِيْمُوا الصَّلٰوةَ وَاٰتُوا الزَّكٰوةَ وَاَقْرِضُوا اللّٰهَ قَرْضًا حَسَنًا ۭ وَمَا تُقَدِّمُوْا لِاَنْفُسِكُمْ مِّنْ خَيْرٍ تَجِدُوْهُ عِنْدَ اللّٰهِ هُوَ خَيْرًا وَّاَعْظَمَ اَجْرًا ۭ ع ٢ ١٤ وَاسْتَغْفِرُوا اللّٰهَ ۭ اِنَّ اللّٰهَ غَفُوْرٌ رَّحِيْمٌ ⑳

तुझा पालनकर्ता चांगल्याप्रकारे जाणतो की, आपण आणि आपल्या बरोबरच्या लोकांचा एक समूह, दोन तृतीयांश रात्रीच्या जवळपास आणि अर्ध्या रात्रीच्या आणि एक तृतीयांश रात्रीला, तहज्जुद पढत असतात; [३] आणि रात्रंदिवसाचा नीट अंदाज अल्लाहतआला [४] (च) आहे. तो चांगल्या प्रकारे जाणतो की, तुम्ही त्याला मुळीच निभाऊ शकणार नाही. [५] तर त्याने तुम्हावर मेहेरबानी [६] केली. म्हणून जेवढे कुरआन पढणे तुमच्यासाठी सोपे असेल, तेवढेच पढत [७] जा. तो जाणतो की, तुमच्यातून काही आजारी पण असतील, काही दुसरे जमिनीत चालून फिरून, अल्लाहचे औदार्य म्हणजे अन्नसंपत्तीचा शोध घेत असतील; [८] आणि काही लोक अल्लाहच्या मार्गात जिहादपण करतील; [९] तर तुम्ही सुलभतेने जेवढे कुरआन पढूंशकतात, (तेवढेच) पढा. [१०] आणि नमाज पढत [११] रहा आणि जकात देत रहा. आणि अल्लाहतआलाला दिलखुषीने कर्ज द्या. [१२] आणि जे पण पुण्य तुम्ही आमच्याकरीता, पुढे पाठवाल, त्याला अल्लाहतआलाजवळ उत्तमांत उत्तम आणि पुण्यप्रतिफलांत फारच जास्त पावाल. [१३] आणि अल्लाहतआलाजवळ (आपल्या अपराधांची) क्षमा मागित रहा. नि:संशय अल्लाहतआला क्षमाकर्ता आणि दयाळूंआहे. २०

हदीसमध्ये येते की, अल्लाह कयामतच्या दिवशी आदम ﷺ ला म्हणेल की, आपल्या संततीमधून नरकाग्नीसाठी काढून घे. ह.आदम ﷺ म्हणतील हे अल्लाह ! कशा प्रकारे? अल्लाह फर्मावील, प्रत्येक हजारांतून ९९९. या वेळी प्रत्येक गर्भवती स्त्रीचा गर्भ पडून जाईल आणि बालक वृद्ध होऊन जातील. अल् हदीस. (अल् बुखारी तफसीर सू.हज्ज)

१) हे त्या दिवसाचे दुसरे वैशिष्ट्य आहे. त्या दिवशी भयानकतेने आकाश फाटून जाईल.

२) म्हणजे अल्लाहतआलाने जे, मृत्यूनंतर पुन्हा जिवंत होऊन उठणे, (कर्मांचा) हिशेब, आणि स्वर्ग व नर्काचा वायदा केलेला आहे, हे कुठल्याही परिस्थितीत होऊन रहाणे आहे.

३) जेव्हा अध्यायाच्या प्रारंभी, अर्धी रात्र किंवा याच्यापेक्षा कमी, किंवा जास्त, (नमाजीत) उभे रहाण्याचा हुकूम दिला गेला, तेव्हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आणि आपल्या बरोबर सहाबांचा एक समूह रात्री (नमाजीत) उभे रहात, कधी दोन तृतीयांशपेक्षा कमी, कधी अर्धी रात्र आणि कधी एक तृतियांश हिस्सा जसा की येथे उल्लेख आहे. परंतु एक तर रात्रीचे हे सतत नमाजीकरता जागणे फारच जेर करणारे होते. दुसऱ्या वेळेचा हा अंदाज, अर्धी रात्र किंवा एक तृतियांश किंवा दोन तृतियांश हिस्सा नमाजीत उभे रहाणे आहे, यापेक्षासुद्धा जास्त कठीण होते. म्हणून अल्लाहने या महावाक्यात कमी करण्याचा हुकूम अवतरीत केला. ज्याचा अर्थ काही जवळ (रात्रीला नमाजीत) उभे रहाण्याला तर्क करून देण्याची परवानगी आहे. आणि काही जवळ, हे आहे की, याच्या फर्जाला (आपल्या) पसंतीत बदलून देण्यांत आले. आता न हे उम्मतकरीता फर्ज आहे, न नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लम करीता आणि काही म्हणतात की, हे कमी करणे उम्मतकरता आहे. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम करिता इचे पढणे आवश्यक होते.

४) म्हणजे अल्लाहतआला तर रात्रीच्या घटका मोजूशकतो की, किती घटका होऊन चुकल्या आणि किती बाकी राहिल्या? तुमच्या करीता हा अंदाज करणे शक्य नाही.

५) जेव्हा तुमच्या करीता किती रात्र निघून गेली याचा ठीक ठीक अंदाज शक्यच नाही. तर तुम्ही निश्चित केलेल्या वेळेपर्यंत, तहज्जुदच्या नमाजीत मग्नपण कशाप्रकारे राहूशकतात?

६) म्हणजे अल्लाहने रात्रीला नमाजीत उभे रहाण्याच्या म्हणजे (तहज्जुद पढण्याला) रद्द करून टाकले; आणि आता फक्त तिचे पसंत असणे बाकी राहून गेले आहे. आणि ते पण वेळेच्या बंधनाशिवाय. अर्धी रात्र, किंवा एक तृतीयांश रात्र किंवा दोन तृतीयांश रात्रीचे बंधन सुद्धा आवश्यक नाही. जर तुम्ही थोडासा वेळ खर्च करून, दोन रकाती सुद्धा पढून घ्याल, तर अल्लाहजवळ रात्रीच्या (नमाजीत) उभे राहण्याच्या पुण्यप्रतिफळाला प्राप्त ठरून जाल. तथापि जर कोणी मनुष्य ८ रकात तहज्जुदची नियमितता पाळेल, जशी की, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमची नेहमीची सवय होती; तर हे जास्त चांगले होईल. आणि तो नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या आज्ञाधिन ठरवला जाईल.

७) 'फक्रऊ' चा अर्थ आहे 'फसल्लु' आणि कुरआनाचा अर्थ आहे, नमाज. रात्री (नमाजीच्या) उभे राहण्यांत कारण की कायम दिर्घ असतो, आणि कुरआन पण जास्त पढले जाते. म्हणून तहज्जुदच्या नमाजीलाच कुरआनाने संबोधित केले गेले. जसे नमाजीत सू.फातेहा फारच आवश्यक आहे. म्हणून अल्लाहतआलाने हदीसे कुदशी मध्ये जी सू.फातिहाच्या भाष्यांत येऊन चुकली आहे; सू.फातिहाला नमाजने संबोधित केले आहे. मी सू.फातिहाला माझ्या व सेवकांच्या दरम्यान वाटून टाकली अल्हदीस म्हणून ''जेवढे कुरआन पढणे सुलभ असेल, पढून घ्या.'' चा अर्थ आहे, रात्रीला जेवढी नमाज पढू शकतात, पढून घ्या. इच्याकरीता न वेळेचे बंधन आहे, आणि न रकातीचे. या महावाक्याने हनफी लोक आधार घेत म्हणतात की, नमाजमध्ये सू.फातिहा पढणे आवश्यक नाहीं, जेवढे कोणासाठी सुलभ असेल (तेवढे) पढून घ्यावे. जर कोणी एक महावाक्य पण, कोठून पण पढून घेईल, तर नमाज होऊन जाईल. परंतु प्रथम तर येथे किरआत् नमाजीच्या अर्थात आहे. जसे की, आम्ही वर्णन केले. म्हणून महावाक्याचा संबंध या गोष्टीशी नाही की, नमाजमध्ये किती किराअत् आवश्यक आहे. दुसरे, जर याचा संबंध, किराअत्शीच मान्य केला जाईल, तरीही हा आधार आपल्यांत काही शक्ती ठेवित नाही. कारण की, 'मा तय्यस्सरा' चे भाष्य, स्वत: नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी केले आहे की, ती कमीत कमी किराअत्, जिच्याशिवाय नमाज होणार नाही, ती सू.फातिहा आहे. म्हणून आपण फर्माविले आहे की, हे (सू.फातिहा) जरूर पढा, जसे की, सहीह आणि सशक्त आणि स्पष्ट हदीर्शींमध्ये हा हुकूम आहे. नबी ﷺ च्या या भाष्याच्या विरोधांत, हे म्हणणे की, नमाजीमध्ये सू.फातिहा हा आवश्यक नाही किंबहुना कोणतीही आयत पढून घ्या, नमाज होऊन जाईल. मोठीच नावडती कर्मे आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या हदीर्शींशी बेपर्वाई आणि अहंकारपूर्ण प्रदर्शन आहे. तसेच त्यांच्या आपल्या इमामांच्या सुद्धा विरुद्ध आहे. जे त्यांनी धर्मशास्त्राच्या (फिकाच्या) पुस्तकांत लिहले आहे की, या महावाक्याने सू.फातिहाचे तर्क (रद्द) करणे इमामाचे अनुकरण करणाऱ्यावर याचा आधार घेणे योग्य नाही. यासाठी की दोन महावाक्ये एकमेकांच्या विरुद्ध आहेत. (तपशीला करीता सू.फातिहा जे फर्ज होणे ईमामांचे अनुकरण करणाऱ्यांवर लिहलेली पुस्तके कृपया पहावी.)

८) म्हणजे व्यापार आणि कारभाराकरीता प्रवास करणे, आणि एका शहरातून दुसऱ्या शहरात, किंवा एका देशांतून दुसऱ्या देशांत जावे लागेल.

९) अशाच प्रकारे जिहादमध्ये कष्टपूर्ण प्रवास आणि परिश्रम करावे लागतात. आणि या तिन्ही गोष्टी, आजार, प्रवास आणि जिहाद आळीपाळीने प्रत्येकाला यांची गरज पडतेच. म्हणून अल्लाहतआलाने कयामुल लैल (म्हणजे तहज्जुद) च्या हुकुमामध्ये कमी करून दिली आहे. कारण की, तिन्ही अवस्थेत हे (तहज्जुद पढणे) फारच कठीण आणि मोठेच सहनशिलतेचे काम आहे.

१०) तहज्जुदच्या कमी करण्याच्या कारणांसह कमीचा हा हुकूम ताकीद म्हणून दुसऱ्यांदा देण्यांत आला आहे.

११) म्हणजे पांच नमाजींची ज्या फर्ज आहेत.

१२) म्हणजे अल्लाहच्या मार्गांत आवश्यकतेनुसार आणि अल्लाहतआलाच्या हिदायत (तौफिक) नुसार खर्च करा. त्याला चांगले कर्ज म्हणून यासाठी संबोधित केले की, अल्लाहतआला याच्या बदल्यांत सातशेपट किंबहुना याच्या पेक्षा सुद्धा जास्त मोबदला आणि पुण्यप्रतिफल बहाल करीन.

१३) म्हणजे नफील नमाजीमध्ये, जकात व दानधर्म आणि दुसरी पुण्यकर्मे, जी पण तुम्ही कराल, अल्लाहजवळ त्याचा उत्कृष्ट मोबदला पावाल. बहुतेक भाष्यकारांजवळ. हे महावाक्य क्र.२० मदीनेमध्ये अवतीर्ण झाले आहे. म्हणून ते म्हणतात की, याचा अर्धा हिस्सा, मक्केत आणि अर्धा हिस्सा मदिनेत अवतीर्ण झाला. (अय्सरुत तफासीर)

महावाक्ये ५६ | # (७४)सू.अल-मुद्दस्सिर | रुकूअ २

آياتها ٥٦ (٧٤) سُورَةُ الْمُدَّثِّرِ مَكِّيَّةٌ (٣) ركوعاتها ٢

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

**हे कापड पांघरणाऱ्या[१] ①** يٰٓاَيُّهَا الْمُدَّثِّرُ ①

**उठ ! आणि (लोकांना) सावध कर[२] ②** قُمْ فَاَنْذِرْ ②

**आणि आपल्या पालनकर्त्याचा गौरव कर ③** وَرَبَّكَ فَكَبِّرْ ③

**आणि आपली वस्त्रे पाकसाफ ठेवत जा[३] ④** وَثِيَابَكَ فَطَهِّرْ ④

**आणि गलिच्छपणाचा त्याग कर[४] ⑤** وَالرُّجْزَ فَاهْجُرْ ⑤

**आणि उपकार करून, जास्तीची अपेक्षा करू नकोस[५] ⑥** وَلَا تَمْنُنْ تَسْتَكْثِرُ ⑥

**आणि आपल्या पालनकर्त्याच्या मार्गात सहनशिलता पत्कर ⑦** وَلِرَبِّكَ فَاصْبِرْ ⑦

**मग जेव्हा तुतारी फुंकली जाईल. ⑧** فَاِذَا نُقِرَ فِي النَّاقُوْرِ ⑧

**तर तो दिवस एक कठीण दिवस असेल ⑨** فَذٰلِكَ يَوْمَئِذٍ يَّوْمٌ عَسِيْرٌ ⑨

**(जे) काफिरांसाठी मुळीच सोपे होणार नाही.[६] ⑩** عَلَى الْكٰفِرِيْنَ غَيْرُ يَسِيْرٍ ⑩

**मला आणि त्याला सोडून दे, ज्याला मी एकट्याने निर्माण केले आहे.[७] ⑪** ذَرْنِيْ وَمَنْ خَلَقْتُ وَحِيْدًا ⑪

**आणि त्याला पुष्कळसे द्रव्य देऊन ठेवले आहे. ⑫** وَّجَعَلْتُ لَهٗ مَالًا مَّمْدُوْدًا ⑫

**आणि त्याच्याबरोबर हजर रहाणारे मुलगे सुद्धा[८] ⑬** وَّبَنِيْنَ شُهُوْدًا ⑬

१) सर्व प्रथम जे 'वह्य' अवतरीत झाले ते 'इक्रअ बिस्मे रब्बिकल् लजी खलक' आहे. याच्यानंतर 'वह्य' येण्यांत खंड पडला. आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम फारच व्याकूळ आणि परेशान राहू लागले. एके दिवशी अचानक मग तोच देवदूत, जो हिराच्या गुफेमध्ये पहिल्या वेळीस वह्य घेऊन आला होता. आपण पाहिले की आकाश व पृथ्वीच्या दर्म्यान एका खूर्चीवर बसला आहे ज्याने आपल्यावर एक भयसे आच्छादून गेले. आणि घरी जाऊन घरवाल्यांना सांगितले माझ्यावर काही पांघरुण घाला! माझ्यावर काही पांघरुण घालून द्या!! म्हणून त्यांनी आपल्या शरीरावर एक कापड आच्छादून दिले. याच अवस्थेत हे 'वह्य' अवतरीत झाले. (स.बुखारी व स.मुस्लिम)

२) म्हणजे मक्कावाल्यांना भय दाखव; जर ते ईमान आणणार नाहीत.

३) म्हणजे चित्त शुद्धी पण ठेव आणि इरादापूर्वक, कपडे पण पाकसाफ ठेव. हा हुकूम यासाठी देण्यांत आला की मक्केचे मुशरिक, पाकसाफ राहण्याची काळजी घेत नसत.

४) म्हणजे मूर्तींची पूजा सोडून दे, हा वास्तविक लोकांना आपल्या मार्फत हुकूम दिला जात आहे.

५) म्हणजे उपकार करून, ही इच्छा बाळगू नकोस की, बदल्यात यापेक्षा जास्त मिळेल.

६) म्हणजे कयामतचा दिवस काफिरांवर फारच भारी होईल; कारण की त्या दिवशी त्या कुफ्रचा परिणाम त्यांना भोगावा लागेल. जे कुफ्र ते जगांत करीत राहिले असतील.

७) हे बोल धमकी आणि भिवविण्याचे आहेत की ज्याला मी आईच्या पोटांमध्ये एकट्याने निर्माण केले. ज्याच्याजवळ न धनदौलत होती न संतती होती. आणि मला एकटाच सोडून द्या. म्हणजे मी स्वत:च त्याच्याशी निपटून घेईल. असे म्हणतात की, हा वलीद बिन मुगिराकडे इशारा आहे. हा कुफ्र आणि शिरजोरीत फारच पुढे गेला होता. म्हणून याचा विशेष उल्लेख केला आहे. वल्लाहु अअ्लम्!

८) अल्लाहने त्याला बरेच पूत्र बहाल केले होते. आणि ते नेहमी त्याच्याचजवळ राहत असत. घरांत धनदौलतची विपुलता होती. म्हणून मुलांना व्यापार आणि कारभारासाठी बाहेर जाण्याची आवश्यकता पडत नसे. काही म्हणतात की हे सात पुत्र होते. काहींच्या जवळ १२ आणि काहींच्याजवळ १३ होते. यांच्यातून तीन मुसलमान होऊन गेले होते. खालीद, हिशाम आणि वलीद बिन वलीद, रजी अल्लाहु अन्हुम (फत्हूल कदीर)

| | |
|---|---|
| आणि त्याला मी पुष्कळशी संपन्नता देऊन ठेवली आहे. (१) १४ | وَّمَهَّدْتُّ لَهٗ تَمْهِيْدًا ﴿١٤﴾ |
| तरी त्याची इच्छा आहे की, मी त्याला आणखी जास्त द्यावे. (२) १५ | ثُمَّ يَطْمَعُ اَنْ اَزِيْدَ ﴿١٥﴾ |
| नाही, नाही! (३) तो आमच्या महावाक्यांचा विरोधक आहे. (४) १६ | كَلَّا ؕ اِنَّهٗ كَانَ لِاٰيٰتِنَا عَنِيْدًا ﴿١٦﴾ |
| लवकरच मी त्याला सक्त शिक्षा (५) पोहचविन १७ | سَاُرْهِقُهٗ صَعُوْدًا ﴿١٧﴾ |
| त्याने विचार करून अदमास बांधला. (६) १८ | اِنَّهٗ فَكَّرَ وَقَدَّرَ ﴿١٨﴾ |
| तर त्याला मार असो! (त्याने) कसा अदमास बांधला? १९ | فَقُتِلَ كَيْفَ قَدَّرَ ﴿١٩﴾ |
| तर पुन्हा त्याच्यावर मार असो! तो कशा प्रकारे अद्मास बांधतो (७) २० | ثُمَّ قُتِلَ كَيْفَ قَدَّرَ ﴿٢٠﴾ |
| त्याने पुन्हा पाहिले, (८) २१ | ثُمَّ نَظَرَ ﴿٢١﴾ |
| मग कपाळावर आढ्या घालून तोंड वाईट केले. (९) २२ | ثُمَّ عَبَسَ وَبَسَرَ ﴿٢٢﴾ |
| मग पाठ फिरवली आणि अहंकार केला. (१०) २३ | ثُمَّ اَدْبَرَ وَاسْتَكْبَرَ ﴿٢٣﴾ |
| आणि म्हणूलागला ही तर निव्वळ जादूआहे. जी नक्कल केली जाते (११) २४ | فَقَالَ اِنْ هٰذَآ اِلَّا سِحْرٌ يُّؤْثَرُ ﴿٢٤﴾ |
| शिवाय माणसाच्या म्हणण्याच्या काही सुद्धा नाही. २५ | اِنْ هٰذَآ اِلَّا قَوْلُ الْبَشَرِ ﴿٢٥﴾ |
| तर मी लवकरच त्याला नरकाग्नीत टाकून देईन २६ | سَاُصْلِيْهِ سَقَرَ ﴿٢٦﴾ |
| आणि तू काय समजलास की नरकाग्नी (१२) आहे तरी काय वस्तू? २७ | وَمَآ اَدْرٰىكَ مَا سَقَرُ ﴿٢٧﴾ |
| न ती शिल्लक ठेवते आणि न सोडून देते (१३) २८ | لَا تُبْقِيْ وَلَا تَذَرُ ﴿٢٨﴾ |
| कातडीला होरपळून टाकील. २९ | لَوَّاحَةٌ لِّلْبَشَرِ ﴿٢٩﴾ |
| आणि तिच्यावर एकोणावीस (देवदूत तैनात) आहेत. (१४) ३० | عَلَيْهَا تِسْعَةَ عَشَرَ ﴿٣٠﴾ |

१) म्हणजे द्रव्य आणि संततीमध्ये राज्य आणि सरदारीमध्ये आणि दीर्घ आयुष्यांत.

२) म्हणजे कुफ्र आणि गुन्ह्यांचे असून सुद्धा त्याची इच्छा आहे की, मी त्याला आणखी जास्त द्यावे.

३) म्हणजे मी त्याला आणखी जास्त देणार नाही.

४) 'अनीद्' त्या माणसाला म्हणतात, जो जाणत असून सुद्धा, सत्त्याचा विरोध आणि त्याचे खंडन करतो.

५) म्हणजे अशा शिक्षेत ग्रस्त करील, जिचे सहन करणे फारच कठीण असेल. काही म्हणतात नरकाग्नीमध्ये आगीचा पर्वत असेल. ज्यावर याला चढविले जाईल. 'इरहाक' चा अर्थ आहे. मनुष्यावर जड वस्तू लादून देणे. (फत्हूल कदीर)

६) म्हणजे कुरआन आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचा संदेश ऐकून त्याने विचार केला की मी या गोष्टीवर काय उत्तर देऊ? आणि आपल्या मनांत त्याने ते तयार केले.

७) ही त्याच्या बाबतीत शापाची वाणी आहे की, गारद होवो! मारला जावो!! त्याने काय विचार केला आहे?

८) मग पुन्हा विचार केला की, कुरआनाचे खंडन कशा प्रकारे शक्य आहे ?

९) म्हणजे उत्तराचा विचार करते वेळी, कपाळावर आढ्या पडल्या, तोंड वाईट केले जसा की कोण्या कठीण गोष्टींवर विचार करतेवेळी, मनुष्य सर्वसाधारणपणे असेच करतो.

१०) म्हणजे सत्त्याकडून तोंड फिरविले आणि ईमान आणण्यापासून अहंकार केला.

११) म्हणजे कोणाजवळून शिकून आला. आणि तेथून नक्कल करून आणली आहे; आणि दावा करून दिला की, हे अल्लाहचे अवतरीत केलेले आहे.

१२) नरकाग्नीच्या नांवातून किंवा दर्जातून एकाचे नांव सकर सुद्धा आहे.

१३) त्याच्यां शरीरावर न मांस शिल्लक ठेवेल न हाडे. किंवा अर्थ आहे नर्कवासियांना न जिवंत सोडेल न मृत. ''ला यमुतो फिहा वला यह्या''

१४) म्हणजे नरकाग्नीवर पहारेकरी म्हणून १९ देवदूत तैनात आहेत.

وَمَا جَعَلْنَآ أَصْحٰبَ النَّارِ إِلَّا مَلٰٓئِكَةً ۙ وَّمَا جَعَلْنَا
عِدَّتَهُمْ إِلَّا فِتْنَةً لِّلَّذِيْنَ كَفَرُوْا ۙ لِيَسْتَيْقِنَ
الَّذِيْنَ أُوْتُوا الْكِتٰبَ وَيَزْدَادَ الَّذِيْنَ اٰمَنُوْٓا إِيْمَانًا
وَّلَا يَرْتَابَ الَّذِيْنَ أُوْتُوا الْكِتٰبَ وَالْمُؤْمِنُوْنَ ۙ وَلِيَقُوْلَ
الَّذِيْنَ فِيْ قُلُوْبِهِمْ مَّرَضٌ وَّالْكٰفِرُوْنَ مَاذَآ أَرَادَ
اللّٰهُ بِهٰذَا مَثَلًا ۭ كَذٰلِكَ يُضِلُّ اللّٰهُ مَنْ يَّشَاۗءُ
وَيَهْدِيْ مَنْ يَّشَاۗءُ ۭ وَمَا يَعْلَمُ جُنُوْدَ رَبِّكَ إِلَّا
هُوَ ۭ وَمَا هِيَ إِلَّا ذِكْرٰى لِلْبَشَرِ ۝٣١

**आम्ही नरकाग्नीचे पहारेकरी फक्त देवदूत ठेविले आहेत; आणि आम्ही त्यांची संख्या फक्त काफिरांच्या अजमाविण्यासाठी निश्चित केली आहे.** [१] **(आणि तसेच) यासाठी की ग्रंथधारी लोकांनी खात्री करून घ्यावी.** [२] **आणि ईमानवाल्यांनी ईमानांत वाढून जावे.** [३] **आणि ग्रंथधारी लोक आणि मुसलमान यांनी शंका करू नये. आणि ज्यांच्या मनांत रोग आहे ते आणि काफिर म्हणतील की, या सांगण्याने अल्लाहचा काय उद्देश्य आहे?** [४] **अशाप्रकारे अल्लाहतआला ज्याला इच्छितो त्याला बहकवितो आणि ज्याला इच्छितो त्याला सन्मार्ग दाखवितो.** [५] **तुझ्या पालनकर्त्याच्या सैन्याला त्याच्याशिवाय कोणी जाणत नाही.** [६] **हा तर सर्व मनुष्य मात्रासाठी निव्वळ एक बोध मात्र आहे.** [७] (३१)

كَلَّا وَالْقَمَرِ ۝٣٢

**खरेच सांगतो** [८] **की मला चंद्राची शपथ** (३२)

وَالَّيْلِ إِذْ أَدْبَرَ ۝٣٣

**आणि रात्रीची जेव्हा ती मागे जाऊ लागते.** (३३)

وَالصُّبْحِ إِذَآ أَسْفَرَ ۝٣٤

**आणि सकाळची जेव्हा की ती फटफटीत उजाडते.** (३४)

إِنَّهَا لَإِحْدَى الْكُبَرِ ۝٣٥

**(की खचित्‌च नरकाग्नी) मोठ्या आपत्तीमधून एक (आपत्ती) आहे.** [९] (३५)

१) हे मक्केच्या मुशरिकांचे खंडन आहे. जेव्हा नरकाग्निच्या पहारेकऱ्यांचा अल्लाहने उल्लेख केला तेव्हा, अबुजहलने कुरैश समूहाला संबोधित करून म्हटले की, काय तुमच्यातून प्रत्येक दहा माणसांचा गट, एकेका देवदूतासाठी पुरेसा होणार नाही. काही म्हणतात की, कलदः नामी मनुष्याने ज्याला आपल्या शक्तीवर फार गर्व होता. म्हणाला तुम्ही सर्व दोन देवदूत सांभाळून घ्या; सतरा देवदुतांना मी एकटाच पुरेसा आहे. असे म्हणतात की, याने रसूलुल्लाह ﷺ ला कुस्तीचे पण कित्येक वेळा आवाहन दिले आणि प्रत्येक वेळा हार खाल्ली. परंतु ईमान आणले नाही. असे म्हणतात की, त्याच्या शिवाय रुकाना बिन अब्द यजीदच्या बरोबर सुद्धा आपण ﷺ नी कुस्ती खेळली होती, परंतु त्यांनी पराभव पत्करुन, ते मुसलमान होऊन गेले होते. (इब्ने कसीर) अर्थ आहे की ही संख्या सुद्धा त्यांचा उपहास आणि परीक्षेला कारणीभूत होऊन गेली.

२) म्हणजे जाणून घ्यावे की हा पैगंबर सत्त्यावर आहे. आणि याने पण तिच गोष्ट केली आहे जी मागील पुस्तकांमध्ये नमूद आहे.

३) की, ग्रंथधारी लोकांनी त्यांच्या पैगंबरांच्या गोष्टीला मान्य केले आहे.

४) रोगी मनावाल्यांपासून दांभिक अभिप्रेत आहेत किंवा मग ते आहेत, ज्यांच्या मनांत शंकाकुशंका आहेत. कारण की मक्केमध्ये दांभिक नव्हते. म्हणजे हे विचारतील की यांच्या संख्येचा येथे उल्लेख करण्याचा अल्लाहचा काय उद्देश्य आहे ?

५) म्हणजे मागील बहकण्याप्रमाणे, ज्याला इच्छितो त्याला बहकवितो, आणि ज्याला इच्छितो त्याला सन्मार्ग दाखवितो. याच्यांत जे प्रगल्भ प्रयोजन असते, त्याला फक्त अल्लाहच जाणतो.

६) म्हणजे हे काफिर आणि मुशरिकीन समजतात की, नरकाग्नीमध्ये तर फक्त १९ च देवदूत आहेत ना? त्यांच्यावर काबू मिळविणे कोणते कठीण काम आहे? परंतु त्यांना ठाऊक नाही की, अल्लाहची सैन्ये तर एवढी आहेत की, ज्यांना अल्लाहशिवाय कोणी जाणतच नाही. फक्त देवदूतच एवढ्या संख्येत आहेत की, ७० हजार देवदूत रोज, अल्लाहच्या उपासनेकरीता, बैतुल मअ्मुर मध्ये दाखल होतात. मग कयामतपर्यंत त्यांची पाळी येणार नाही. (स.बुखारी व स.मुस्लिम)

७) म्हणजे हा नरकाग्नी आणि त्यावर तैनात केलेले देवदूत मनुष्यांच्या धडा आणि बोध घेण्यासाठी आहेत की, कदाचित् त्यांनी आज्ञाभंगापासून परावृत्त व्हावे.

८) 'कल्ला', हे मक्केवाल्यांच्या विचारांचे खंडन आहे. म्हणजे ते जे समजतात की, आम्ही देवदुतांवर प्रबळ होऊन जाऊं; असे मुळीच होणार नाही. शपथ आहे चंद्राची आणि रात्रीची जेव्हा ती मागे हटेल म्हणजे जाऊ लागेल.

९) हे शपथेचे उत्तर आहे. 'कुबर' हे कुबराचे अनेकवचन आहे. तीन फारच महत्त्वाच्या गोष्टींची शपथ घेतल्यानंतर अल्लाहने नरकाग्नीची महत्ता आणि भयानकतेचे वर्णन केले. ज्यामुळे हीची मोठी आपत्ती होण्यांत शंका राहत नाही.

نَذِيۡرًا لِّلۡبَشَرِ ۙ﴿۳۶﴾
आदमच्या मुलांना भिवविणारी (३६)

لِمَنۡ شَآءَ مِنۡكُمۡ اَنۡ يَّتَقَدَّمَ اَوۡ يَتَاَخَّرَ ﴿۳۷﴾
(म्हणजे) त्याला जो [१] तुमच्यातून पुढे जाऊ इच्छील, किंवा मागे सरकू इच्छील [२] (३७)

كُلُّ نَفۡسٍۢ بِمَا كَسَبَتۡ رَهِيۡنَةٌ ۙ﴿۳۸﴾
प्रत्येक मनुष्य आपल्या कर्मांच्या बदल्यांत गहाण आहे. [३] (३८)

اِلَّاۤ اَصۡحٰبَ الۡيَمِيۡنِ ﴿۳۹﴾
परंतु उजव्या हातवाले. [४] (३९)

فِىۡ جَنّٰتٍ ۛ يَتَسَآءَلُوۡنَ ۙ﴿۴۰﴾
की ते स्वर्गात विचारत असतील (४०)

عَنِ الۡمُجۡرِمِيۡنَ ۙ﴿۴۱﴾
गुन्हेगारांना [५] (४१)

مَا سَلَـكَكُمۡ فِىۡ سَقَرَ ﴿۴۲﴾
की तुम्हांस नरकाग्नीत कोणत्या गोष्टीने टाकले? (४२)

قَالُوۡا لَمۡ نَكُ مِنَ الۡمُصَلِّيۡنَ ۙ﴿۴۳﴾
ते उत्तर देतील की आम्ही नमाजी नव्हतो (४३)

وَلَمۡ نَكُ نُطۡعِمُ الۡمِسۡكِيۡنَ ۙ﴿۴۴﴾
न गरीबांना जेऊ घालीत होतो. [६] (४४)

وَكُنَّا نَخُوۡضُ مَعَ الۡخَآئِضِيۡنَ ۙ﴿۴۵﴾
आणि आम्ही बकवाद करणाऱ्या, (नाकारणाऱ्यांचा) साथ देऊन, वादविवादांत मग्न रहात असू. [७] (४५)

وَكُنَّا نُكَذِّبُ بِيَوۡمِ الدِّيۡنِ ۙ﴿۴۶﴾
आणि निर्णयाच्या दिवसाला पण आम्ही खोटे ठरवत होतो. (४६)

حَتّٰٓى اَتٰٮنَا الۡيَقِيۡنُ ﴿۴۷﴾
येथपावेतो की आम्हास मृत्यू येऊन गेला. [८] (४७)

فَمَا تَنۡفَعُهُمۡ شَفَاعَةُ الشّٰفِعِيۡنَ ﴿۴۸﴾
तर त्यांना शिफारस करणाऱ्यांची शिफारस फायदा देणार नाही. [९] (४८)

فَمَا لَهُمۡ عَنِ التَّذۡكِرَةِ مُعۡرِضِيۡنَ ۙ﴿۴۹﴾
त्यांना काय होऊन गेले आहे? की उपदेशापासून तोंड फिरवित आहे. (४९)

كَاَنَّهُمۡ حُمُرٌ مُّسۡتَنۡفِرَةٌ ۙ﴿۵۰﴾
जणू ती बिचकलेली गाढवे होत (५०)

فَرَّتۡ مِنۡ قَسۡوَرَةٍ ﴿۵۱﴾
जी सिंहाला पाहून पळताहेत [१०] (५१)

१) म्हणजे हा नरकाग्नी भिवविणारा आहे. किंवा या 'नजीर' ने अभिप्रेत नबी करीम ﷺ आहेत. किंवा कुरआन आहे. कारण की, कुरआन सुद्धा आपल्या सांगितलेल्या वायदे आणि धमक्यांच्या अनुषंगाने, माणसांकरीतां 'नजीर' आहे.

२) म्हणजे ईमान आणि आज्ञापालन पुढे जाऊ इच्छतील, किंवा मागे सरकूं इच्छतील, अर्थ आहे की, तंबी प्रत्येकासाठी आहे, ईमान आणावे किंवा कुफ्र करावे.

३) 'रहन' गहाण ठेवण्याला म्हणतात. म्हणजे प्रत्येक मनुष्य आपल्या कर्माच्या बदल्यांत गहाण आहे. ते कर्म त्याला शिक्षेपासून सोडवून घेईल. (जर ते चांगले असेल) किंवा त्याला गारद करून टाकेल. (जर ते वाईट असेल.)

४) म्हणजे ते आपल्या गुन्ह्यांचे कैदी होणार नाही. किंबहुना आपल्या चांगल्या कर्मामुळे मुक्त होतील.

५) स्वर्गवासी उंच हवेल्यांत बसून नर्कवासियांना प्रश्न करतील.

६) नमाज अल्लाहच्या हक्कांतून, आणि गरीबांना जेऊ घालणे सेवकांच्या हक्कामधून आहे. अर्थ आहे की, आम्ही न अल्लाहचे हक्क अदा केले न बंद्यांचे हक्क.

७) वांकडा मार्ग अनुसरलेल्या आणि बहकलेल्या लोकांमध्ये उत्साहाने भाग घेत असत.

८) 'यकीन' चा अर्थ मृत्यू आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी आहे. ''वअ़्बुद् रब्बक हत्ता यअ्तिअक्ल् यकीन' आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना करत रहावी येथपावेतो की, आपणारा मृत्यू येऊन जावा. (सू.हिज्र:९९)

९) म्हणजे ज्यांच्यात चर्चित वैशिष्ट्ये असतील. त्याला कोणाची शिफारसपण काही कामा येणार नाही. कारण की तो कुफ्रमुळे शिफारशीला पात्रच होणार नाही. शिफारस तर फक्त त्यांच्याकरीता फायदेकारक होईल, जे ईमानामुळे शिफारशीला पात्र ठरतील अल्लाहकडून शिफारशीची परवानगी सुद्धा त्यांच्याच करीता मिळेल, न की प्रत्येका करीता.

१०) म्हणजे हे सत्याचा तिरस्कार आणि त्यापासून विमुख होण्यामध्ये असे आहेत, जसे जंगली भयभित गाढवे सिंहापासून पळतात. जेव्हा ते यांची शिकार करू इच्छितात. 'कसवरा' म्हणजे सिंह काहींनी 'बाण चालविणारा' असा अर्थपण केला आहे.

بَلْ يُرِيْدُ كُلُّ امْرِئٍ مِّنْهُمْ اَنْ يُّؤْتٰى صُحُفًا مُّنَشَّرَةً ﴿٥٢﴾

**किंबहुना यांच्यातून प्रत्येक मनुष्य इच्छितो की, त्याला उघडलेली पुस्तके दिली जावीत.**[1] ५२

كَلَّا ؕ بَلْ لَّا يَخَافُوْنَ الْاٰخِرَةَ ؕ﴿٥٣﴾

**असे मुळीच होऊ शकत नाही .मुळांत हे कयामतपासून निर्भय आहेत**[2] ५३

كَلَّاۤ اِنَّهٗ تَذْكِرَةٌ ۚ﴿٥٤﴾

**खरी गोष्ट तर ही आहे की, हे (कुरआन) एक बोध आहे.**[3] ५४

فَمَنْ شَآءَ ذَكَرَهٗ ؕ﴿٥٥﴾

**आता जो इच्छील तो त्याचे मनन करील.** ५५

وَمَا يَذْكُرُوْنَ اِلَّاۤ اَنْ يَّشَآءَ اللّٰهُ ؕ هُوَ اَهْلُ التَّقْوٰى وَاَهْلُ الْمَغْفِرَةِ ۠﴿٥٦﴾ ع ٢٥/١٦

**आणि हे तेव्हाच मनन करतील, जेव्हा अल्लाहतआला इच्छील.**[4] **तो याच्या योग्य आहे की त्याला भ्यावे; आणि याला सुद्धा योग्य आहे की त्याने क्षमा करावी.**[5] ५६

سُوْرَةُ الْقِيٰمَةِ مَكِّيَّةٌ (٧٥) — اٰيَاتُهَا ٤٠ — رُكُوْعَاتُهَا ٢ — (٣١)

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

## (७५) सू. कियाम:

महावाक्ये ४० — रुकूअ २

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

لَاۤ اُقْسِمُ بِيَوْمِ الْقِيٰمَةِ ۙ﴿١﴾

**मी शपथ वहातो कयामतच्या दिवसाची**[6] १

وَلَاۤ اُقْسِمُ بِالنَّفْسِ اللَّوَّامَةِ ؕ﴿٢﴾

**आणि शपथ वहातो त्या मनाची, जे निर्भत्सना करत असते.**[7] २

اَيَحْسَبُ الْاِنْسَانُ اَلَّنْ نَّجْمَعَ عِظَامَهٗ ؕ﴿٣﴾

**काय मनुष्य असा विचार करीत आहे की, आम्ही त्याची हाडे जमा करणारच नाही.**[8] ३

१) म्हणजे प्रत्येकाच्या हातांत एक एक पुस्तक अल्लाहकडून उघडलेले अवतरीत व्हावे. ज्यांत लिहिलेले असावे की, मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) अल्लाहचे पैगंबर आहेत. काहींनी याचा भावार्थ हा केला की, कर्माशिवाय हे शिक्षेकडून सुटका इच्छितात. म्हणजे प्रत्येकाला मुक्तीचा परवाना मिळून जावा. (इब्ने कसीर)

२) म्हणजे यांच्या फिसादामुळे, यांचे परलोकावर ईमान नसणे आणि त्याला नाकारणे आहे. ज्याने त्यांना निर्भय बनवून दिले आहे.

३) परंतु त्याच्या करीता, जो या कुरआनापासून हितोपदेशाचा बोध मिळवू इच्छेल.

४) म्हणजे कुरआनापासून सन्मार्ग आणि बोध तोच प्राप्त करेल, ज्याला अल्लाह इच्छील, ''आणि तुम्ही सकल जगाच्या पालनकर्त्याच्या इच्छेशिवाय, काही इच्छूंशकत नाही.'' (सू.अल्तकवीर-२९)

५) म्हणजे तो अल्लाहच याच्या योग्य आहे की त्याला भ्याले जावे. आणि तोच क्षमा करण्याचे अधिकार बाळगतो. म्हणून तोच या गोष्टीला पात्र आहे, की त्याचे आज्ञापालन केले जावे. आणि त्याच्या आज्ञाभंजनापासून वांचले जावे. कारण की मनुष्य त्याच्या क्षमेला आणि दयेला पात्र ठरावा.

६) 'ला उकसिमु' मध्ये ला जास्तीचा आहे. अरबी भाषेची एक पद्धत आहे. काही म्हणतात की शपथेच्यापूर्वी काफिरांच्या म्हणण्याचे खंडन आहे. ते म्हणत असत, मृत्यूनंतर कुठलेही जीवन नाही. 'ला' (नाही) च्या मार्फत सांगण्यांत आले, ज्याप्रमाणे तुम्ही म्हणतात, मामला असा नाही. मी कयामतच्या दिवसाची शपथ वाहतो. कयामतच्या दिवसाची शपथ वाहण्याचा उद्देश्य त्याचे महत्त्व आणि महत्तेला स्पष्ट करणे आहे.

७) म्हणजे भलाईवर पण करतो की, जास्त का नाही केली. आणि वाईटांवर सुद्धा, की यापासून परावृत्त का झालो नाही? जगांत सुद्धा ज्यांची सद्सद्विवेक बुद्धी जागृत होत असते, त्यांची मने त्यांची निर्भत्सना करीत असतात. तथापि परलोकांत तर सर्वांची मने त्यांची निर्भत्सना करतील.

८) हे शपथेचे उत्तर आहे, मनुष्याने येथे अभिप्रेत काफिर आणि नास्तिक मनुष्य आहे. जो कयामतला मानीत नाही. त्याची कल्पना चुकीची आहे. अल्लाहतआला खचित्च मनुष्यांच्या अवयवांना गोळा करील. येथे हाडांचा विशेष म्हणून उल्लेख केला. यासाठी की हाडेच मूळ, निर्मितीचा सांगाडा आणि साचा आहे.

بَلٰى قٰدِرِيْنَ عَلٰٓى اَنْ نُّسَوِّيَ بَنَانَهٗ ﴿٤﴾

**होय! (अवश्य) जमा करू. आम्ही तर समर्थ आहोत की, त्याचे पेर पेर दुरुस्त करून देऊ.[१] (४)**

بَلْ يُرِيْدُ الْاِنْسَانُ لِيَفْجُرَ اَمَامَهٗ ﴿٥﴾

**किंबहुना मनुष्य तर इच्छीतो की पुढे ही आज्ञाभंजन करीत रहावे.[२] (५)**

يَسْـَٔلُ اَيَّانَ يَوْمُ الْقِيٰمَةِ ﴿٦﴾

**(तो) विचारतो की, कयामतचा दिवस केव्हा येईल?[३] (६)**

فَاِذَا بَرِقَ الْبَصَرُ ﴿٧﴾

**तर जेव्हा डोळे थिजून जातील.[४] (७)**

وَخَسَفَ الْقَمَرُ ﴿٨﴾

**आणि चंद्र निस्तेज होऊन जाईल.[५] (८)**

وَجُمِعَ الشَّمْسُ وَالْقَمَرُ ﴿٩﴾

**आणि सूर्य आणि चंद्र (दोन्ही) एकत्र गोळा केली जातील.[६] (९)**

يَقُوْلُ الْاِنْسَانُ يَوْمَىِٕذٍ اَيْنَ الْمَفَرُّ ﴿١٠﴾

**त्या दिवशी मनुष्य म्हणेल की, आज पळून जाण्याची जागा कोठे आहे?[७] (१०)**

كَلَّا لَا وَزَرَ ﴿١١﴾

**नाही! नाही!! कोणी आश्रयस्थान नाही.[८] (११)**

اِلٰى رَبِّكَ يَوْمَىِٕذِ ۨالْمُسْتَقَرُّ ﴿١٢﴾

**आज तर तुझ्या पालनकर्त्याकडेच ठिकाणा आहे.[९] (१२)**

يُنَبَّؤُا الْاِنْسَانُ يَوْمَىِٕذٍۢ بِمَا قَدَّمَ وَاَخَّرَ ﴿١٣﴾

**आज मनुष्याला त्याने पुढे पाठविलेले आणि मागे सोडून दिलेले याची जाणीव करून देण्यांत येईल.[१०] (१३)**

بَلِ الْاِنْسَانُ عَلٰى نَفْسِهٖ بَصِيْرَةٌ ﴿١٤﴾

**किंबहुना मनुष्य स्वत:च आपल्यावर आपणच पुरावा आहे.[११] (१४)**

وَّلَوْ اَلْقٰى مَعَاذِيْرَهٗ ﴿١٥﴾

**जरी आपले तमाम निमित्त का पूढे आणिना![१२] (१५)**

१) 'बनान' हात आणि पायांच्या त्या किनाऱ्यांना म्हणतात, जे सांधे, नखे, सुक्ष्म शिरा आणि बारिक हाडे यांनी बनलेली असतात. जेव्हा बारीक आणि सुक्ष्म वस्तू आम्ही बिलकुल बरोबर जोडून देऊ, तर मोठ्या मोठ्या भागांना जोडून देणे, आमच्या करीता काय कठीण होईल?

२) म्हणजे या आशेवर आज्ञाभंजन, आणि सत्त्याला नाकारतो की, कोणती कयामत येणार आहे ?

३) प्रश्न याच्यासाठी विचारत नाही की, अपराधांची क्षमा मागून घ्यावी; किंबहुना कयामतला अशक्य घटना समजून विचारतो. म्हणूनच वाईट कृत्यांपासून माघार घेत नाही. तथापि पुढील महावाक्यामध्ये अल्लाहतआला कयामतच्या येण्याचा वेळ सांगत आहे.

४) दहशत आणि आश्चर्याने. जसे मृत्यूच्या वेळी, सर्व साधारण पणे होते.

५) जेव्हा चंद्राला ग्रहण लागते, तर त्यावेळी सुद्धा तो निस्तेज होऊन जातो. परंतु हे चंद्राचे निस्तेच होऊन जाणे, जे कयामतच्या निशाण्यांमधून आहे, जेव्हा होईल, तर त्याच्यानंतर त्याच्यांत प्रकाश येणार नाही.

६) म्हणजे निस्तेजपणांत अर्थ आहे की, चंद्राप्रमाणे सूर्याचा प्रकाश पण संपून जाईल.

७) म्हणजे जेव्हा या घटना घडून येतील, तेव्हा मग अल्लाहपासून किंवा नरकाग्नीच्या शिक्षेपासून पळून जाण्याचा मार्ग शोधील. परंतु, त्यावेळी पळून जाण्याचा मार्ग कोठे असेल.?

८) 'वजर' डोंगराला किंवा किल्ल्याला म्हणतात. जेथे मनुष्य आश्रय घेऊन घेतो. तेथे असे कोणी आश्रयस्थान नसेल.

९) जेथे तो सेवकांदर्म्यान निर्णय करेल. हे शक्य होणार नाही की, कोणी अल्लाहच्या या न्यायालयापासून लपून राहील.

१०) म्हणजे त्याला याची सर्व कर्मे विदीत केली जातील; जुनी असो अथवा नवी. सुरवातीची असो वा शेवटची, लहान असो अथवा मोठे; ''जे काही त्यांनी केले होते, सर्व हजर पावतील.'' (सू.कहफ-४९)

११) म्हणजे याचे हात, पाय, जीभ आणि दुसरे अवयव साक्ष देतील किंवा हा अर्थ आहे की, मनुष्य आपले दोष स्वत:च जाणतो.

१२) म्हणजे वादविवाद करेल, एकाहून एक स्पष्टीकरण देईल. परंतु असे करणे न त्याच्या करीता फायदेदायक आहे. आणि न तो आपल्या सद्सद् विवेक बुद्धीचे समाधान करू शकतो.

لَا تُحَرِّكۡ بِهٖ لِسَانَكَ لِتَعۡجَلَ بِهٖ ۝١٦
**(अहो पैगंबर!) आपण कुरआनाला लवकर (पाठ करण्यासाठी), आपली जीभ हलवित जाऊं नका.** [1] ⑯

إِنَّ عَلَيۡنَا جَمۡعَهٗ وَقُرۡءَانَهٗ ۝١٧
**त्याचे तोंडपाठ करवून देणे आणि वांचविणे ही आमची जबाबदारी आहे.** [2] ⑰

فَإِذَا قَرَأۡنَٰهُ فَٱتَّبِعۡ قُرۡءَانَهٗ ۝١٨
**जेव्हा आम्ही त्याला वाचून** [3] **घेऊ, तेव्हा त्याला आपण वाचण्याचे अनुकरण करीत जा.** [4] ⑱

ثُمَّ إِنَّ عَلَيۡنَا بَيَانَهٗ ۝١٩
**त्यानंतर त्याला समजाऊन सांगणे आमचेच काम आहे.** [5] ⑲

كَلَّا بَلۡ تُحِبُّونَ ٱلۡعَاجِلَةَ ۝٢٠
**नाही, नाही! तुम्ही तर लवकर मिळणाऱ्या (इहलोकाला) प्रिय ठेवतात.** ⑳

وَتَذَرُونَ ٱلۡأٓخِرَةَ ۝٢١
**आणि परलोकाला सोडून बसतात.** [6] ㉑

وُجُوهٞ يَوۡمَئِذٖ نَّاضِرَةٌ ۝٢٢
**त्या दिवशी पुष्कळशे चेहरे टवटवीत व ताजे असतील.** ㉒

إِلَىٰ رَبِّهَا نَاظِرَةٞ ۝٢٣
**आपल्या पालनकर्त्याकडे पाहत असतील.** [7] ㉓

وَوُجُوهٞ يَوۡمَئِذِۭ بَاسِرَةٞ ۝٢٤
**आणि कित्येक चेहरे, त्या दिवशी उदास व फिक्के पडलेले असतील.** [8] ㉔

تَظُنُّ أَن يُفۡعَلَ بِهَا فَاقِرَةٞ ۝٢٥
**समजत असतील की त्याच्या बरोबर असा मामला** [9] **केला जाईल, जो त्यांची कंबर तोडून टाकील.** ㉕

كَلَّآ إِذَا بَلَغَتِ ٱلتَّرَاقِيَ ۝٢٦
**नाही, नाही!** [10] **जेव्हा प्राण गळ्यापर्यंत येऊन पोहचेल.** [11] ㉖

१) ह.जिब्रईल عليه السلام जेव्हा वह्य घेऊन येत, तेव्हा नबी ﷺ सुद्धा, त्यांचे बरोबर घाईघाईने म्हणत जात. की कोणी शब्द विसरला न जावा. अल्लाहने आपणांस अशाप्रकारे देवदुताबरोबर म्हणण्यास मना केले. (स. बुखारी तफसीर सू.कियाम:) हा विषय पहिले पण येऊन चुकला आहे. ''तू कुरआन म्हणण्यात घाई करूंनकोस. याच्यापूर्वी की तुझ्याकडे जे 'वह्य' केले जाईल, ते पूर्ण केले जावे. (सू.ताहा-११४) म्हणून या हुकूमानंतर आपण ﷺ स्तब्ध राहून ऐकत.

२) म्हणजे आपल्या हृदयात याला जमवून देणे आणि आपल्या जिभेवर याचे म्हणणे (किराअत) याची जबाबदारी आमची आहे की, याचा कोणी भाग आपल्या स्मरण शक्तीतून निघून न जावा. आणि स्मरणांतून लोप पाऊं नये.

३) म्हणजे देवदूत (जिब्रईल) च्या मार्फत, जेव्हा आम्ही याचे पठण, आपल्यावर पूर्ण करून देऊं.

४) म्हणजे याचे धार्मिक आदेश लोकांना म्हणून ऐकवा आणि त्याचे अनुकरण पण करा.

५) म्हणजे याच्या कठीण गोष्टींचा खुलासा, आणि हराम व हलालचे स्पष्टीकरण, ही पण आमची जबाबदारी आहे. याचा स्पष्ट अर्थ आहे की, नबी ﷺ नी कुरआनाच्या महावाक्यांचा जो तपशील आणि कठीण गोष्टींचा खुलासा आणि त्याच्या सर्वसाधारण गोष्टींची वैशिष्टये जी सांगितली आहेत, ज्याला हदीस म्हणतात, ही सुद्धा अल्लाहकडूनच मनांत टाकलेल्या आणि समजविलेल्या गोष्टी आहेत. म्हणून त्यांना सुद्धा कुरआनाप्रमाणे मानणे आवश्यक आहे.

६) म्हणजे कयामतच्या दिवसाला खोटे ठरवणे, अल्लाहने जे अवतीर्ण केले त्याचा विरोध, आणि सत्त्याकडून तोंड फिरविणे, यासाठी आहे की तुम्ही, इहलौकीक जीवनालाच सर्व काही समजून ठेवले आहे. आणि परलोकाला तुम्ही बिलकुल विसरुन गेला आहात.

७) हे ईमानवाल्यांचे चेहरे असतील. जे आपल्या चांगल्या परिणामामुळे समाधानी, खूष आणि तेजस्वी असतील. आणि अल्लाहच्या दर्शनाने सुद्धा आनंदमय असतील. जसे की सहीह हदीशींनी सिद्ध आहे. आणि अहले सुन्नतची एकमताने धारणा आहे.

८) हे काफिरांचे चेहरे असतील. 'बासिरतून' विवर्ण, पिवळे पडलेले, दु:ख आणि उदासिनतेने काळे पडलेले, आणि उदास व फिक्के.

९) आणि तो हाच की, नरकाग्नीत त्यांना झोंकून देण्यात येईल.

१०) म्हणजे हे शक्य नाही की, काफिर कयामतवर ईमान घेऊन येतील.

११) 'तराकी' 'तर्कुवत' चे अनेकवचन आहे. हे मानेजवळ, छाती आणि खांद्याच्या दर्म्यान एक हाड आहे. म्हणजे जेव्हा मृत्यूचा लोखंडी पंजा, तुम्हास आपल्या पंजात घेऊन घेईल.

وَقِيلَ مَنْ ۜ رَاقٍ ﴿٢٧﴾
आणि म्हटले जाईल की कोणी मांत्रिक[१] आहे? (२७)

وَظَنَّ أَنَّهُ الْفِرَاقُ ﴿٢٨﴾
आणि खात्री होऊन जाईल, हा वियोग होण्याचा वेळ आहे.[२] (२८)

وَالْتَفَّتِ السَّاقُ بِالسَّاقِ ﴿٢٩﴾
आणि पिंडरीला पिंडरी चिकटून जाईल.[३] (२९)

إِلَىٰ رَبِّكَ يَوْمَئِذٍ الْمَسَاقُ ﴿٣٠﴾
आज तुझ्या पालनकर्त्याकडे प्रयाण आहे. (३०)

فَلَا صَدَّقَ وَلَا صَلَّىٰ ﴿٣١﴾
त्याने न मान्य केले, न नमाज पढली.[४] (३१)

وَلَٰكِن كَذَّبَ وَتَوَلَّىٰ ﴿٣٢﴾
किंबहुना खोटे ठेवले आणि तोंड फिरवले[५] (३२)

ثُمَّ ذَهَبَ إِلَىٰ أَهْلِهِ يَتَمَطَّىٰ ﴿٣٣﴾
तद्नंतर ऐटत ऐटत, आपल्या कुटुंबाकडे चालता झाला.[६] (३३)

أَوْلَىٰ لَكَ فَأَوْلَىٰ ﴿٣٤﴾
खेद आहे तुझ्यावर खेद आहे. (३४)

ثُمَّ أَوْلَىٰ لَكَ فَأَوْلَىٰ ﴿٣٥﴾
पुन्हा तुझ्यावर[७] खेद आहे, आणि पुन्हा खेद आहे. (३५)

أَيَحْسَبُ الْإِنسَانُ أَن يُتْرَكَ سُدًى ﴿٣٦﴾
काय मनुष्य असे समजतो की, त्याला असेच निरर्थक सोडून दिले जाईल?[८] (३६)

أَلَمْ يَكُ نُطْفَةً مِّن مَّنِيٍّ يُمْنَىٰ ﴿٣٧﴾
काय तो एका विर्याचा थेंब नव्हता, जो टपकविण्यांत आला होता. (३७)

ثُمَّ كَانَ عَلَقَةً فَخَلَقَ فَسَوَّىٰ ﴿٣٨﴾
त्यानंतर तो रक्ताचा एक गोळा होऊन गेला, मग अल्लाहने त्याला निर्माण केले आणि दुरुस्त बनवून दिले.[९] (३८)

فَجَعَلَ مِنْهُ الزَّوْجَيْنِ الذَّكَرَ وَالْأُنثَىٰ ﴿٣٩﴾
मग त्यापासून दंपत्ती, म्हणजे नर व मादी बनविले. (३९)

أَلَيْسَ ذَٰلِكَ بِقَادِرٍ عَلَىٰ أَن يُحْيِيَ الْمَوْتَىٰ ﴿٤٠﴾
काय (अल्लाहतआला) या गोष्टीस समर्थ नाही की, मृतास जिवंत करून द्यावे.[१०] (४०)

१) म्हणजे उपस्थितांमध्ये कोणी आहे, जो मंत्र म्हणून, तुम्हास मृत्यूच्या पंजातून सोडवून घेईल? काहींनी याचे भाषांतर हे सुद्धा केले आहे की, याचा प्राण कोण घेऊन चढेल? दयेचे देवदूत की, शिक्षेचे देवदूत? या स्वरुपांत हे म्हणणे देवदुतांचे आहे.

२) म्हणजे त्या माणसाची खात्री होऊन जाईल, ज्याचा प्राण कंठापर्यंत आला आहे की, आता द्रव्य, संतती आणि इहलोकाच्या प्रत्येक गोष्टीपासून वियोगाची घटका येऊन पोहचली.

३) याच्याने एकतर मृत्यूच्यावेळी, पिंडरी बरोबर पिंडरी मिळून जाणे अभिप्रेत आहे किंवा, एका मागून एक त्रास बहुतेक भाष्यकारांनी दुसरा अर्थ घेतला आहे. (फत्हुल कदीर)

४) म्हणजे या माणसाने पैगंबर आणि कुरआनाला मान्य केले नाही आणि नमाज पढली नाही. म्हणजे अल्लाहची उपासना केली नाही.

५) म्हणजे पैगंबराला खोटे ठरवले आणि ईमान आणि आज्ञापालनाकडून तोंड फिरविले.

६) 'यतमत्ता' ऐट दाखवीत, आणि शेखीने.

७) हे दटावणीचे शब्द आहेत. असे सांगतात की याचे मूळ आहे. ''अल्लाह तुला अशा गोष्टीत ग्रस्त करो! जिला तू नापसंत करतो!''

८) म्हणजे न त्याला कोण्या गोष्टीचा हुकूम दिला जाईल, न कोण्या गोष्टीपासून मना करण्यात येईल, न त्याचा हिशेब घेतला जाईल, न त्याला शिक्षा दिली जाईल. त्याला कबरीत नेहमीसाठी सोडून देण्यांत येईल, आणि त्याला दुसऱ्यांदा जिवंत केले जाणार नाही.

९) 'फसव्वा' म्हणजे त्याला ठीक ठाक केले आणि त्याला पूर्णत्वाला पोहचविले आणि त्याच्यांत प्राण फुंकला.

१०) म्हणजे जो अल्लाह, मनुष्याला अशा प्रकारे वेगवेगळ्या अवस्थेतून पसार करून निर्माण करतो. तर काय त्याला मेल्यानंतर पुन्हा दुसऱ्यांदा जिवंत करण्यास समर्थ नाही?

महावाक्ये ३१ | रुकूअ २

# (७६) सू. दहर

سُوْرَةُ الدَّهْرِ مَدَنِيَّةٌ (٩٨) (٧٦) | اٰيَاتُهَا ٣١ | رُكُوْعَاتُهَا ٢

बिस्मिल्ला – परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

هَلْ اَتٰى عَلَى الْاِنْسَانِ حِيْنٌ مِّنَ الدَّهْرِ لَمْ يَكُنْ شَيْـًٔا مَّذْكُوْرًا ①

**खचित्‌च मनुष्यावर एक असा काळ पण येऊन चुकला (१) आहे जेव्हा की तो कोणी वर्णनीय वस्तू नव्हता.** ①

اِنَّا خَلَقْنَا الْاِنْسَانَ مِنْ نُّطْفَةٍ اَمْشَاجٍ نَّبْتَلِيْهِ فَجَعَلْنٰهُ سَمِيْعًا بَصِيْرًا ②

**नि:संशय आम्ही त्याला मिश्र वीर्याने परीक्षा घेण्याकरीता, (२) निर्माण केले; आणि त्याला ऐकता आणि पाहता बनविले. (३)** ②

اِنَّا هَدَيْنٰهُ السَّبِيْلَ اِمَّا شَاكِرًا وَّ اِمَّا كَفُوْرًا ③

**आम्ही त्याला मार्ग दाखविला; आता त्याने कृतज्ञ बनावे किंवा कृतघ्न (४)** ③

اِنَّآ اَعْتَدْنَا لِلْكٰفِرِيْنَ سَلٰسِلَاۡ وَ اَغْلٰلًا وَّ سَعِيْرًا ④

**खचित्‌च आम्ही काफिरांकरीता साखळ्या आणि मानखोडे, आणि धगधगीत आग तयार करून ठेवली आहे. (५)** ④

اِنَّ الْاَبْرَارَ يَشْرَبُوْنَ مِنْ كَاْسٍ كَانَ مِزَاجُهَا كَافُوْرًا ⑤

**नि:संशय सदाचरणी लोक ते प्याले पितील ज्यांत कापुराचे मिश्रण असेल. (६)** ⑤

✪ याच्या मदनी आणि मक्की होण्यांत मतभेद आहेत. बहुतेक त्याला मदनी ठरवितात. काही म्हणतात की, शेवटची दहा महावाक्ये मक्की आहेत. बाकी सर्व मदनी (फत्हुल कदीर) नबी ﷺ शुक्रवारच्या दिवशी सकाळच्या नमाजीत अलीफ लाम मीम सिजदा व सू.दहर पढत असत. (स.मुस्लिम) या अध्यायाला सू.इन्सान पण म्हटले जाते.

१) 'हल्' 'कद्' च्या अर्थात आहे. जसे की, भाषांतराने स्पष्ट आहे. 'अल् इन्सान' ने अभिप्रेत काहींजवळ मनुष्यांचे पितामह, प्रथम मनुष्य ह.आदम عليه السلام आहेत. आणि 'हिनून्' (एक वेळ) ने अभिप्रेत प्राण फुंकल्या जाण्यापूर्वीचा काळ आहे, जो चाळीस वर्षे आहे आणि बहुतेक भाष्यकारांजवळ, 'अल् इन्सान' चा शब्द एक वर्ग म्हणून उपयोगात आणला गेला आहे. आणि 'हिनून्' ने अभिप्रेत गर्भ म्हणजे आईच्या गर्भाशयांत रहाण्याची मुदत आहे. ज्यांत तो उल्लेख करण्यायोग्य वस्तू नसतो. याच्यांत जणू मनुष्याला तंबी देण्यात आली आहे की, तो एक सौंदर्याचा पुतळा म्हणून जेव्हा बाहेर येतो, तेव्हा (आपल्या) पालनकर्त्यासमोर ऐट दाखवितो आणि शेखी मिरवितो. त्याला आपल्या स्थितीला लक्षांत ठेवावयास पाहिजे. की मी तर तोंच आहे, जेव्हा मी शुन्य जगतांत होतो. तेव्हा मला कोण ओळखत होते?

२) 'एकत्र मिळालेले' चा अर्थ, पुरुष आणि स्त्री दोघांच्या पाण्याचे (वीर्याचे) मिळणे. मग त्यांचे वेगवेगळ्या अवस्थेतून पार पडणे आहे. निर्माण करण्याचा उद्देश्य मनुष्याची कसोटी घेणे आहे. ''की तुम्हास आजमावावे, की तुमच्यातून चांगली कामे कोण करतो.'' (सू.मुल्क-२)

३) म्हणजे त्याला ऐकण्याचे आणि पाहण्याचे ज्ञान प्रदान केले. कारण की त्याने सर्व काही पाहू आणि ऐकू शकावे. आणि याच्यानंतर आज्ञापालन किंवा गुन्हेगारी दोन्ही मार्गामधून, कोण्या एकाची निवड करू शकावी.

४) म्हणजे चर्चित सामर्थ्य आणि क्षमतेशिवाय, आम्ही स्वत: सुद्धा, पैगंबर अलैहिमुस सलाम, आपली पुस्तके आणि सत्त्याच्या आवाहकांमार्फत, सरळ मार्गाला वर्णन आणि स्पष्ट करून दिले. आता हे त्याच्या मर्जीवर अवलंबून आहे की अल्लाहच्या आज्ञापालनाचा मार्ग अंगीकारून, कृत सेवक बनून जावे; किंवा दुराचरणाचा मार्ग अंगीकारून त्याचा कृतघ्न बनून जावे. जसे एका हदीसमध्ये नबी ﷺ नी फर्माविले, ''प्रत्येक मनुष्य आपल्या जीवाची खरेदी आणि विक्री करतो. तर त्याला गारद करून टाकतो किंवा त्याला मुक्त करवून घेतो.'' (स.मुस्लिम) म्हणजे आपले कर्म आणि प्रयत्नांमार्फत गारद किंवा मुक्त करतो. जर वाईट (पाप) कमावील, तर आपल्या जीवाला गारद, आणि चांगले (पुण्य) कमावील, तर आपल्या जिवाला मुक्त करवून घेईल.

५) हा अल्लाहने दिलेल्या स्वातंत्र्याचा चुकीच्या उपयोगाचा परिणाम आहे.

६) दुराचरणी लोकांच्या तुलनेत हा सदाचरणी लोकांचा उल्लेख आहे. 'कास', त्या प्याल्याला म्हणतात, जो भरलेला असेल आणि वरून डबडबत असेल. कापुर थंड आणि एका विशिष्ट सुगंधाने युक्त असतो. याच्या मिश्रणाने मद्याची चव, दुप्पट चांगली आणि सुगंध जीवाला, सुगंधीत करून देणारा होऊन जाईल.

عَيْنًا يَّشْرَبُ بِهَا عِبَادُ اللّٰهِ يُفَجِّرُوْنَهَا تَفْجِيْرًا ۝٦

**जो एक झरा आहे, [१] ज्यातून अल्लाहचे सेवक पितील; त्यांचे झरे वाहवून नेतील. [२] ⑥**

يُوْفُوْنَ بِالنَّذْرِ وَيَخَافُوْنَ يَوْمًا كَانَ شَرُّهٗ مُسْتَطِيْرًا ۝٧

**(जिकडे इच्छतील) जे आपले नवस पूर्ण करतात; [३] आणि त्या दिवसाला भितात, ज्याचा अपकार चोहोकडे पसरुन जाणारा आहे [४] ⑦**

وَيُطْعِمُوْنَ الطَّعَامَ عَلٰى حُبِّهٖ مِسْكِيْنًا وَّيَتِيْمًا وَّاَسِيْرًا ۝٨

**आणि अल्लाहच्या प्रेमात [५] गरीब मोताद, अनाथ, आणि कैद्यांना जेऊ घालतात ⑧**

اِنَّمَا نُطْعِمُكُمْ لِوَجْهِ اللّٰهِ لَا نُرِيْدُ مِنْكُمْ جَزَآءً وَّلَا شُكُوْرًا ۝٩

**आम्ही तर तुम्हास फक्त अल्लाहच्या सुप्रसन्नतेसाठी जेऊं घालतो; न तुमच्यापासून काही मोबदला इच्छितो, न आभार मानणे. ⑨**

اِنَّا نَخَافُ مِنْ رَّبِّنَا يَوْمًا عَبُوْسًا قَمْطَرِيْرًا ۝١٠

**नि:संशय आम्हाला आपल्या पालनकर्त्याकडून, त्या दिवसाची भीती वाटते; [६] जो काठिण्याचा आणि सक्तीचा असेल. ⑩**

فَوَقٰىهُمُ اللّٰهُ شَرَّ ذٰلِكَ الْيَوْمِ وَلَقّٰىهُمْ نَضْرَةً وَّسُرُوْرًا ۝١١

**तर त्यांना अल्लाहतआलाने त्या दिवसाच्या अपकारा (वाईटा) पासून वाचवून घेतले; [७] आणि त्यांना टवटवीतपणा आणि आनंद पोहचविला. [८] ⑪**

१) म्हणजे कापुर मिश्रित मद्य, दोनचार सुरायांत किंवा माठांमध्ये नसेल; किंबहुना त्याचा झरा असेल. म्हणजे हे संपून जाणारे नसेल.

२) म्हणजे याला जिकडे इच्छतील, फिरवून घेतील. आपले महाल आणि इमारतीमध्ये, आपल्या सभा आणि बैठकांमध्ये, आणि बाहेर मैदानांमध्ये आणि सहलींच्या जागांत.

३) म्हणजे फक्त एका अल्लाहची उपासना आणि आज्ञापालन करतात; नवस पण मानतात तर फक्त अल्लाहकरीता, आणि मग त्याला पूर्ण करतात. याच्याने ठाऊक झाले की नवसाचे पूर्ण करणे पण आवश्यक आहे. या अटीवर की, नवस गुन्हेगारीचा नसावा. म्हणून हदीसमध्ये आहे, ''ज्या मनुष्याने नवस केला की अल्लाहतआलाचे आज्ञापालन करेल, तर त्याने त्याचे आज्ञापालन करावे ज्याने अल्लाहच्या आज्ञाभंगाचा नवस मानला आहे, तर त्याने अल्लाहचा आज्ञाभंग करू नये.'' म्हणजे त्या नवसाला पूर्ण करू नये. (स.बुखारी)

४) म्हणजे त्या दिवसाला भिऊन, निषीद्ध गोष्टी आणि पापाचरण करीत नाहीत. वाईट पसरून जाण्याचा अर्थ आहे की, त्या दिवशी अल्लाहच्य पकडीपासून फक्त तोंच वांचेल, ज्याला अल्लाह आपल्या क्षमा आणि दयेच्या पदराआड घेऊन घेईल. बाकी सर्व त्यांच्या वाईटाच्या (पापाच्या) लपेटमध्ये येऊन जातील.

५) किंवा जेवण्याचे प्रेम असूनसुद्धा, ते अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी, गरजुंना जेऊ घालतात. कैदी जर मुस्लिमेतर असतील, तरी सुद्धा त्यांच्याशी चांगली वागणूक करण्याची ताकीद आहे. जसे बद्रच्या युद्धातील काफिर कैद्यांच्या बाबतीत नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी सहाबांना हुकूम दिला की, त्यांचा आदर करा. म्हणून सहाबा प्रथम त्यांना जेऊ घालीत, स्वत: नंतर खात (इब्ने कसीर) अशाच प्रकारे गुलाम आणि नौकर चाकर सुद्धा याच्याच अंतर्गत येतात; ज्यांच्या बाबतीत चांगली वागणूक देण्याची ताकीद आहे. आपण ﷺ ची शेवटची इच्छा सुद्धा हीच होती की, ''नमाज आणि आपल्या गुलामांची काळजी ठेवा'' (इब्ने माजा)

६) हज्रत इब्ने अब्बास ﷺ नी 'कम्तरीर' चा अर्थ 'लांब रुंद' चा केला आहे. 'अबूस' कठीण. म्हणजे तो दिवस फारच कठीण असेल; आणि सक्ती आणि भयानकतेमुळे काफिरांवर फारच दिर्घ असेल. (इब्ने कसीर)

७) जसे की ते याच्या वाईट परिणामापासून भित होते आणि यापासून वांचण्यासाठी अल्लाहचे आज्ञापालन करीत होते.

८) टवटवीतपणा चेहऱ्यावर असेल, आणि आनंद मनांत, जेव्हा मनुष्याचे मन आनंदाने ओसंडून जाते, तेव्हा त्याचा चेहरापण अत्त्यानंदाने फुलासारखा टवटवीत होऊन जातो. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत येते की, जेव्हा आपण ﷺ आनंदीत होत होते, तेव्हा आपला शुभचेहरा, अशा प्रकारे तेजस्वी बनत, जणू चंद्राचा तुकडा आहे. (स.बुखारी)

وَجَزٰىهُمْ بِمَا صَبَرُوْا جَنَّةً وَّحَرِيْرًا ﴿١٢﴾

आणि त्यांना त्यांच्या सहनशिलतेच्या [१] बदल्यात स्वर्ग आणि रेशमी पोषाख बहाल केले ⑫

مُّتَّكِـِٕيْنَ فِيْهَا عَلَى الْاَرَاۗىِٕكِ ۚ لَا يَرَوْنَ فِيْهَا شَمْسًا وَّلَا زَمْهَرِيْرًا ﴿١٣﴾

हे तेथे तख्तांवर तक्के लाऊन बसलेले असतील;न तेथे सूर्याची उष्णता पाहतील, न हिवाळ्याचा गारठा [२] ⑬

وَدَانِيَةً عَلَيْهِمْ ظِلٰلُهَا وَذُلِّلَتْ قُطُوْفُهَا تَذْلِيْلًا ﴿١٤﴾

या झाडांच्या सावल्या त्यांच्यावर झुकलेल्या असतील [३] आणि त्यांची (फळे) त्यांचे घड, खाली लोंबकळत आलेली असतील. [४] ⑭

وَيُطَافُ عَلَيْهِمْ بِاٰنِيَةٍ مِّنْ فِضَّةٍ وَّاَكْوَابٍ كَانَتْ قَوَارِيْرَا۟ ﴿١٥﴾

आणि त्यांच्या पुढून चांदीची भांडी, तिच्या प्याल्यांचा दौर चाललेला असेल; [५] जे कांचेचे असतील. ⑮

قَوَارِيْرَا۟ مِنْ فِضَّةٍ قَدَّرُوْهَا تَقْدِيْرًا ﴿١٦﴾

काचपात्र पण चांदीचे, [६] ज्यांना (पाजणाऱ्याने), आवश्यकतेप्रमाणे मोजून ठेवले असेल. [७] ⑯

وَيُسْقَوْنَ فِيْهَا كَاْسًا كَانَ مِزَاجُهَا زَنْجَبِيْلًا ﴿١٧﴾

आणि त्यांना तेथे ते प्याले पाजण्यांत येतील; ज्यांत सुंठीचे मिश्रण असेल. [८] ⑰

عَيْنًا فِيْهَا تُسَمّٰى سَلْسَبِيْلًا ﴿١٨﴾

स्वर्गाच्या एका झऱ्यातून, ज्याचे नांव 'सलसबील' आहे. [९] ⑱

وَيَطُوْفُ عَلَيْهِمْ وِلْدَانٌ مُّخَلَّدُوْنَ ۚ اِذَا رَاَيْتَهُمْ حَسِبْتَهُمْ لُؤْلُؤًا مَّنْثُوْرًا ﴿١٩﴾

आणि त्यांच्या आजुबाजूला फिरत असतील, अशी लहान मुले जी नेहमी (मुलेच) राहणार आहेत; [१०] जेव्हा तू त्यांना पाहशील तर समजशील की जणू ती इतस्त: पसरलेली खरे मोत्येच आहे. [११] ⑲

१) सहनशिलतेचा अर्थ आहे धर्माच्या बाबतीत ज्या अडचणी येतील त्यांना मोठ्या धैर्याने सहन करणे; अल्लाहच्या आज्ञापालनांत मनेच्छेचे आणि ज्या वाईट गोष्टी करण्यात आनंद वाटतो, त्यांचा त्याग करणे आणि दुराचारापासून वांचणे.

२) 'जमहरीर' कडक गारठ्याला म्हणतात. अर्थ हा आहे की तेथे नेहमी एकच ऋतु राहील, आणि तो आहे वसंत ऋतु. न फार उष्णता, न कडाक्याची थंडी.

३) जरी तेथे सूर्याची उष्णता असणार नाही, असे असूनसुद्धा वृक्षांच्या सावल्या त्यांच्यावर पडलेल्या असतील. किंवा अर्थ आहे झाडांच्या फांद्या त्यांच्या जवळ असतील.

४) म्हणजे वृक्षांची फळे, कानावर आवाज पडतांच आज्ञाधारक माणसाप्रमाणे मनुष्यांचा जीव जेव्हा खाण्याची इच्छा करेल, तर ते झुकून त्यांच्या इतक्या जवळ होऊन जातील की, बसल्या बसल्याच त्यांना तोडून घ्यावे (इब्ने कसीर)

५) म्हणजे सेवक, त्यांना घेऊन स्वर्गवासियांच्या दर्म्यान फिरतील.

६) म्हणजे ही भांडी आणि आपखोरे चांदी आणि कांचेने बनलेले असतील. फारच सुंदर आणि नाजुक. जणू हे कारागिरीचे कौशल्य असे आहे, ज्याचा काही नमुना इहलोकांत नाही.

७) म्हणजे त्याच्यांत मद्य अशा अंदाजाने टाकण्यात आले असेल, की त्याच्याने ते तृप्त पण होऊन जावेत, आणि त्यांना आणखी पण पाहिजे असे वाटू नये. आणि भांड्यात आणि पेल्यांत सुद्धा जास्तीची शिल्लक न रहावी. पाहुणचाराच्या या पद्धतीत सुद्धा, पाहुण्यांच्या आदर सन्मानाचीच काळजी घेण्यांत आली आहे.

८) 'जन्जबील' (सुंठ) वाळलेले आले ला म्हणतात. ही उष्ण असते. इच्या मिश्रणाने एक चांगली वाटणारी कडवटपणा निर्माण होऊन जातो. याशिवाय ही अरबांची एक प्रिय वस्तू आहे. किंबहुना, त्यांच्या कोऱ्या चहांत सुद्धा, 'जन्जबील' शामील असते. अर्थ आहे की, स्वर्गांत एक ते मद्य असेल, जे थंड असेल, ज्यांत कापराचे मिश्रण असेल. दुसरे मद्य उष्ण; ज्याच्यांत 'जनजबील' मिळविलेले असेल.

९) म्हणजे या 'जन्जबील' मद्याचे पण झरे असतील, ज्यांना 'सलसबील' म्हटले जाते.

१०) मद्याची वैशिष्टये वर्णन केल्यानंतर, मद्य पाजणाऱ्यांचे (साकीचे) वैशिष्ट्य सांगण्यांत येत आहे. 'नेहमी राहतील' चा एक अर्थ तर हा आहे की, स्वर्गवाशांप्रमाणे या सेवकांना सुद्धा मृत्यू येणार नाही. दुसरा हा की, त्यांची बाल्यावस्था आणि टवटवीतपणा नेहमी 'जैसा था' कायम राहील. न ते म्हातारे होतील, न त्यांचे रुप सौंदर्य विवर्ण होईल.

११) सौंदर्य व सुडौल आणि तजेला आणि गुबगुबीतपणा, यांत ते मोत्यासारखे असतील. 'इतस्त: विखुरलेले' चा अर्थ, सेवेकरीता सर्वत्र पसरलेले, आणि फारच चापल्याने सेवेत मग्न असतील.

وَإِذَا رَأَيْتَ ثَمَّ رَأَيْتَ نَعِيمًا وَمُلْكًا كَبِيرًا ﴿٢٠﴾

**तू तेथे जेथे कोठेही नजर टाकशील, निव्वळ सुख, आनंद [१] आणि मोठी बादशाही पाहशील.** (२०)

عَالِيَهُمْ ثِيَابُ سُندُسٍ خُضْرٌ وَإِسْتَبْرَقٌ ۖ وَحُلُّوا أَسَاوِرَ مِن فِضَّةٍ وَسَقَاهُمْ رَبُّهُمْ شَرَابًا طَهُورًا ﴿٢١﴾

**त्यांच्या अंगावर हिरवे तलम रेशमाची आणि किनखाबाची मोठी वस्त्रे असतील. [२] आणि त्यांना चांदीच्या कडयांचा दागीना घातला जाईल. [३] आणि त्यांना त्यांचा पालनकर्ता पाक साफ मद्य पाजवील.** (२१)

إِنَّ هَٰذَا كَانَ لَكُمْ جَزَاءً وَكَانَ سَعْيُكُم مَّشْكُورًا ﴿٢٢﴾

**(सांगण्यात येईल) की, हा आहे तुमच्या कर्मांचा मोबदला आणि तुमच्या प्रयत्नांची कदरदाणी** (२२)

إِنَّا نَحْنُ نَزَّلْنَا عَلَيْكَ الْقُرْآنَ تَنزِيلًا ﴿٢٣﴾

**नि:संशय आम्ही तुझ्यावर क्रमाक्रमाने, हळूहळू कुरआन प्रकट केले आहे. [४]** (२३)

فَاصْبِرْ لِحُكْمِ رَبِّكَ وَلَا تُطِعْ مِنْهُمْ آثِمًا أَوْ كَفُورًا ﴿٢٤﴾

**तर तू आपल्या पालनकर्त्याच्या हुकूमावर कायम रहा. [५] आणि यांच्यातून कोण्या गुन्हेगार आणि कृतघ्न (माणसा) चा कह्या मानू नकोस [६]** (२४)

وَاذْكُرِ اسْمَ رَبِّكَ بُكْرَةً وَأَصِيلًا ﴿٢٥﴾

**आणि आपल्या पालनकर्त्याचे नांव सकाळ संध्याकाळ घेत रहा. [७]** (२५)

وَمِنَ اللَّيْلِ فَاسْجُدْ لَهُ وَسَبِّحْهُ لَيْلًا طَوِيلًا ﴿٢٦﴾

**आणि रात्रीच्या वेळेस त्याच्यासमोर सजदे कर. आणि पुष्कळ रात्रीपर्यंत त्याचे पावित्र्य वर्णन करीत रहा. [८]** (२६)

إِنَّ هَٰؤُلَاءِ يُحِبُّونَ الْعَاجِلَةَ وَيَذَرُونَ وَرَاءَهُمْ يَوْمًا ثَقِيلًا ﴿٢٧﴾

**नि:संशय, हे लोक लवकर मिळणाऱ्या (दुनियेला) इच्छीतात; [९] आणि आपल्या मागे एका मोठ्या भारी दिवसाला सोडून देत आहे. [१०]** (२७)

१) म्हणजे तेथे स्वर्गांत जेथे कोठेपण नजर टाकाल.

२) 'सुन्दुस' तलम रेशमी पोषाक व 'इस्तब्रक' जाडे रेशीम.

३) जसे एके काळी बादशाह, सरदार आणि प्रतिष्ठीत प्रकारचे लोक, घालत असत.

४) म्हणजे एकाच वेळी अवतीर्ण करण्याऐवजी, आवश्यकता आणि मागणीनुसार, वेगवेगळ्यावेळी अवतरीत केले. याचा दुसरा अर्थ हा पण होऊ शकतो की, हे कुरआन आम्ही अवतरीत केलेले आहे. तुझे आपले रचलेले नाही. जसा की, मुशरिकीन दावा करतात.

५) म्हणजे त्याच्या निर्णयाची वाट पहा; तो तुझ्या मदतीत काही विलंब करीत आहे, तर याच्यांत त्याचे काही प्रयोजन आहे. म्हणून सहनशिलता आणि धैर्याची गरज आहे.

६) म्हणजे जर हे तुला अल्लाहच्या अवतरीत केलेल्या आदेशांपासून मना करतील, तर त्यांचा कह्या मानू नकोस. किंबहुना धर्मप्रचार आणि आवाहनाचे काम चालू ठेव आणि अल्लाहवर भरवंसा ठेव. तो लोकांपासून तुझे संरक्षण करील. आज्ञाभंजक, जो कर्मात अल्लाहचा आज्ञाभंग करणारा असेल, आणि 'कफूर' जो मनाने कुफ्र करणारा असेल, किंवा कुफ्रमध्ये मर्यादेच्या बाहेर जाणारा असेल. काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत वलीद बिन मुगैरा आहे. ज्याने नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम ला म्हटले होते की, या कामापासून माघार घे. आम्ही तुला तुझ्या म्हणण्याप्रमाणे धनदौलत मिळवून देतो; आणि अरबस्थानच्या ज्या स्त्रीबरोबर लग्न करू इच्छशील, आम्ही तुझे लग्न तिच्याशी करून देतो. (फत्हूल कदीर)

७) सकाळ संध्याकाळने अभिप्रेत सर्व वेळांत अल्लाहचे स्मरण कर. किंवा सकाळ ने अभिप्रेत फज्रची नमाज, आणि संध्याकाळने असरची नमाज आहे.

८) 'रात्रीला सजदा कर' ने अभिप्रेत काहींनी मगरीब आणि इशाच्या नमाजी घेतल्या आहेत. आणि तसबीहचा अर्थ, ज्या गोष्टी अल्लाहच्या लायक नाहीत, त्यापासून त्याचे पावित्र्य वर्णन कर. काहींच्या जवळ याच्याने रात्रीची नफील नमाज म्हणजे तहज्जुद आहे.

९) म्हणजे हे मक्केचे काफिर, आणि त्यांच्या सारखे दुसरे लोक दुनियेच्या प्रेमांत गर्क आहेत. आणि सारे लक्ष याच्यावरच केंद्रित केले आहे.

१०) म्हणजे कयामतला, तिची कठीणता आणि भयानकतेमुळे तिला भारी दिवस म्हटले. आणि सोडण्याचा अर्थ आहे की तिच्याकरीता तयारी करीत नाहीत; आणि तिची पर्वा करीत नाहीत.

نَحْنُ خَلَقْنٰهُمْ وَشَدَدْنَآ اَسْرَهُمْ ۚ وَاِذَا شِئْنَا بَدَّلْنَآ اَمْثَالَهُمْ تَبْدِيْلًا ﴿٢٨﴾

**आम्ही त्यांना निर्माण केले; आणि आम्हीच जोडबंध मजबुत केले.[१] आणि आम्ही जेव्हा इच्छू, त्यांच्या ऐवजी त्यांच्याच सारखे दुसऱ्यांदा बदलून आणू.[२] (२८)**

اِنَّ هٰذِهٖ تَذْكِرَةٌ ۚ فَمَنْ شَآءَ اتَّخَذَ اِلٰى رَبِّهٖ سَبِيْلًا ﴿٢٩﴾

**खचित्‌च हा तर एक उपदेश आहे, तर जो इच्छील तो आपल्या पालनकर्त्याचा मार्ग पत्करील.[३] (२९)**

وَمَا تَشَآءُوْنَ اِلَّآ اَنْ يَّشَآءَ اللّٰهُ ۗ اِنَّ اللّٰهَ كَانَ عَلِيْمًا حَكِيْمًا ﴿٣٠﴾

**आणि तुम्ही न इच्छाल, परंतु हे की, अल्लाहतआलाच इच्छील;[४] नि:संशय अल्लाहतआला ज्ञानी आणि बुद्धीमान आहे.[५] (३०)**

يُّدْخِلُ مَنْ يَّشَآءُ فِيْ رَحْمَتِهٖ ۭ وَالظّٰلِمِيْنَ اَعَدَّ لَهُمْ عَذَابًا اَلِيْمًا ﴿٣١﴾

**ज्याला इच्छितो, आपल्या दयेत दाखल करून घेतो; आणि दु:खदायक शिक्षेची तयारी तर फक्त जालिमांकरीता (च) आहे. (३१)**

## (७७) सू. मुर्सलात

महावाक्ये ५० | रुकूअ २

(٧٧) سُوْرَةُ الْمُرْسَلٰتِ مَكِّيَّةٌ (٣٣) | اٰياتها ٥٠ | ركوعاتها ٢

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَالْمُرْسَلٰتِ عُرْفًا ﴿١﴾

**मनाला प्रसन्न करून टाकणाऱ्या हलक्या वाऱ्याची शपथ[६] (१)**

فَالْعٰصِفٰتِ عَصْفًا ﴿٢﴾

**मग जोराने झोका देणाऱ्या (वाऱ्या) ची शपथ[७] (२)**

وَّالنّٰشِرٰتِ نَشْرًا ﴿٣﴾

**मग (ढगांना) उभारुन, विखरुन टाकणाऱ्या (वाऱ्या) ची शपथ[८] (३)**

१) म्हणजे त्यांच्या पैदा करण्याला मजबुत बनविले, किंवा त्यांचे सांधे, शिरा आणि त्या शिरा ज्या अवयवांना आखडण्या आणि पसरविण्याकरीता असतात, यांच्या मार्फत एक दुसऱ्या बरोबर मिळवून दिले आहे. दुसऱ्या शब्दात, त्यांचा मांजा मजबुत केला.

२) म्हणजे त्यांना नष्ट करून, त्यांच्या जागी दुसऱ्या लोकांना पैदा करून देईल किंवा याचा अर्थ, कयामतच्या दिवशी दुसऱ्यांदा पैदा करणे आहे.

३) म्हणजे या कुरआनापासून हिदायत मिळवून घ्यावी.

४) म्हणजे तुमच्यातून कोणी या गोष्टीवर समर्थ नाही की, तो आपल्याला हिदायतच्या मार्गावर लाऊन घेईल. आपल्यासाठी कोण्या नफ्याला चालू करून घेईल. परंतु होय ! जर अल्लाह इच्छील तर असे शक्य आहे. त्याच्या मर्जीशिवाय तुम्ही काही करूंशकत नाही. तथापि बरोबर प्रयत्न आणि नियतवर, तो मोबदला जरूर देत असतो; ''कर्मांची दारोमदार नियतीवर आहे. प्रत्येक माणसासाठी तेच आहे, ज्याची तो नियत करेल.'' (स.बुखारी स.मुस्लिम)

५) कारण की, तो ज्ञानी आणि बुद्धीमान आहे, म्हणून त्याच्या प्रत्येक कामांत शहाणपण असते. याशिवाय हिदायत आणि बहकण्याचे निर्णय असेच काल्पनिक होऊन जात नाहीत; किंबहुना ज्याला हिदायत दिली जाते, तो खरोखर याला पात्र असतो. आणि ज्याच्या वाट्याला बहकणे येते, तो वास्तविक याच लायकीचा असतो.

✲ हा अध्याय मक्की आहे. जसे की, स.बुखारी व स.मुस्लिममध्ये रिवायत झाले आहे. हजरत इब्ने मसऊद ﷺ म्हणतात की, आम्ही मिनाच्या एका गुफेत होतो. आपल्यावर ﷺ सू.मुर्सलातचे अवतरण झाले. आपण ﷺ यांचे पठण करीत होते आणि मी त्याला आपण ﷺ कडून प्राप्त करून घेत होतो. अचानक एक साप आला, नबी ﷺ नी फर्माविले, त्याला मारून टाका. परंतु तो लवकरच अदृष्ट होऊन गेला. आणि आपण ﷺ नी फर्माविले, ''तुम्ही याच्या वाईटाने, आणि तो तुमच्या वाईटाने वांचून गेला'' (स.बुखारी तफसीर सू.मुर्सलात. स.मुस्लिम) नबी ﷺ नी काही वेळा मगरीबच्या नमाजीत हा सूरह पढला आहे. (अल् बुखारी स.मुस्लिम)

६) या विषयाच्या अनुषंगाने उर्फन्‌चा अर्थ एकामागून एक (सतत वहाणारे) असा होतो. काहींनी मुर्सलातने देवदूत किंवा पैगंबर अभिप्रेत धरले आहेत. या स्वरूपांत उर्फनचा अर्थ, अल्लाहचे वह्य किंवा धर्मशास्त्राचे आदेश असा होईल.

७) किंवा देवदूत अभिप्रेत आहेत. जे काही वेळा वाऱ्यांच्या शिक्षेबरोबर पाठविले जातात.

८) किंवा त्या देवदुतांची शपथ, जे ढगांना पांगवून देतात. किंवा आकाशाच्या वातावरणांत आपले पंख पसरून देतात. तथापि इमाम इब्ने कसीर आणि इमाम तबरीने, या तिघांना वारे अभिप्रेत धरण्याला प्राधान्य दिले आहे. जसे की भाषांतरात सुद्धा याचा अंगीकार करण्यांत आला आहे.

فَالْفٰرِقٰتِ فَرْقًا ۝٤ — **मग सत्य व असत्याला वेगळे वेगळे करून टाकणारे[१]** ④

فَالْمُلْقِيٰتِ ذِكْرًا ۝٥ — **आणि वह्य आणणाऱ्या देवदूतांची शपथ[२]** ⑤

عُذْرًا اَوْ نُذْرًا ۝٦ — **जे निमित्त होण्यासाठी आणि सावध करून देण्यासाठी असते[३]** ⑥

اِنَّمَا تُوْعَدُوْنَ لَوَاقِعٌ ۝٧ — **ज्या गोष्टीचा तुमच्याशी वायदा केला जात आहे, ती खचित्‌च होणार आहे.[४]** ⑦

فَاِذَا النُّجُوْمُ طُمِسَتْ ۝٨ — **तर जेव्हा तारे निस्तेज करून दिले जातील.[५]** ⑧

وَاِذَا السَّمَآءُ فُرِجَتْ ۝٩ — **आणि जेव्हा आकाश तोडून फोडून दिले जाईल.** ⑨

وَاِذَا الْجِبَالُ نُسِفَتْ ۝١٠ — **आणि जेव्हा पर्वत तुकडे तुकडे करून उडवून दिले जातील.[६]** ⑩

وَاِذَا الرُّسُلُ اُقِّتَتْ ۝١١ — **आणि जेव्हा पैगंबर नियमित[७] वेळी आणले जातील.** ⑪

لِاَيِّ يَوْمٍ اُجِّلَتْ ۝١٢ — **कोणत्या दिवसासाठी (त्यांना) थांबविण्यात आले आहे?[८]** ⑫

لِيَوْمِ الْفَصْلِ ۝١٣ — **निर्णयाच्या दिवसाकरीता![९]** ⑬

وَمَآ اَدْرٰىكَ مَا يَوْمُ الْفَصْلِ ۝١٤ — **आणि तुला काय ठाऊक की, निर्णयाचा दिवस काय आहे?** ⑭

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ۝١٥ — **त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यांस दु:ख आहे.[१०]** ⑮

१) म्हणजे त्या देवदुतांची शपथ जे सत्य असत्यांत फरक करणारे आदेश घेऊन उतरतात. किंवा अभिप्रेत कुरआनाची महावाक्ये आहेत. ज्यांच्यामुळे सत्य आणि असत्य आणि हलाल व हरामची ओळख होते. किंवा पैगंबर लोक अभिप्रेत आहेत. जे अल्लाहच्या वह्या मार्फत, सत्य आणि असत्या दर्म्यान फरकाला स्पष्ट करतात.

२) जे अल्लाहची वाणी पैगंबरांना पोहचवितात, किंवा पैगंबर अभिप्रेत आहेत जे अल्लाहकडून अवतीर्ण झालेले 'वह्य' आपल्या उम्मतींना पोहचवितात.

३) म्हणजे देवदूत वह्य घेऊन येतात. की लोकांवर तर्क पूर्ण होऊन जावा आणि ही सबब बाकी राहू नये की आमच्याजवळ अल्लाहचा संदेशच घेऊन कोणी आला नाही. किंवा उद्देश्य भिवविण्याचा आहे. त्यांना जे नाकारणारे किंवा कुफ्र करणारे असतील. किंवा अर्थ आहे ईमानवाल्यांना खुषखबर आणि काफिरांना भिवविणे. ईमाम शौकानी म्हणतात की, मुर्सलात, आसिफात, आणि नाशिरांत ने अभिप्रेत वारे, आणि फारकात आणि मुलकियात ने देवदूत आहेत. हीच गोष्ट वजनी आहे.

४) शपथांनी अभिप्रेत ज्यांची शपथ घेतली त्यांचे महत्त्व ऐकणाऱ्यांवर स्पष्ट करणे, आणि त्याच्या खरेपणाला जाहीर करणे हा असतो. शपथेचे उत्तर हे आहे की, तुमच्याशी कयामतचा जो वायदा करण्यांत येत आहे, ती खचित्‌च घडून येणारी आहे. म्हणजे याच्यांत शंका घेण्याची नाही, किंबहुना तिच्याकरता तयारी करण्याची आवश्यकता आहे. ही कयामत केव्हा घडून येईल ? पुढील महावाक्यामध्ये याला स्पष्ट करण्यात येत आहे.

५) 'तमस' चा अर्थ संपून जाण्याचा आणि नामशेष होण्याचा आहे. म्हणजे जेव्हा ताऱ्यांचा प्रकाश संपून जाईल किंबहुना त्यांचे नामोनिशाण मिटून जाईल.

६) म्हणजे त्यांना जमिनीतून उपटून कण कण करून टाकले जाईल, आणि जमीन बिल्कुल साफ आणि सपाट होऊन जाईल.

७) म्हणजे न्याय निवाडा आणि अल्लाहच्या हुकुमासाठी, त्याचे जबाब ऐकून त्यांच्या लोकांच्या बाबतीत फैसला केला जाईल.

८) हे प्रश्न विचारणे, सन्मान आणि आश्र्चर्यासाठी आहे. म्हणजे कशा महान दिवसांकरीता, ज्याची कठिणता आणि भयानकता, लोकांसाठी फारच आश्र्चर्यचकीत करणारी असेल. या पैगंबरांना गोळा होण्याचा वेळ दिला गेला आहे?

९) म्हणजे ज्या दिवशी लोकांच्या दर्म्यान फैसला केला जाईल. कोणी स्वर्गांत आणि कोणी नर्कात जाईल.

१०) म्हणजे नाश आहे. काही म्हणतात वैल नरकाग्नीच्या एका दरीचे नांव आहे. हे महावाक्य या अध्यायांत वारंवार सांगण्यांत आले आहे. यासाठी की, प्रत्येक खोटे ठरवणाऱ्यांचा अपराध, एक दुसऱ्यापासून वेगवेगळ्या प्रकारचा असेल. याच हिशेबाने शिक्षेचे स्वरुप पण वेगवेगळे असेल. याशिवाय याच 'वैल' चे वेगवेगळे प्रकार आहे. ज्याला वेगवेगळ्या खोटे ठरवणाऱ्यांसाठी, वेगळे वेगळे सांगण्यात आले आहे. (फत्हूल कदीर)

أَلَمْ نُهْلِكِ الْأَوَّلِينَ ﴿١٦﴾
**काय आम्ही पूर्वीच्या लोकांचा नाश केला नाही ? (१६)**

ثُمَّ نُتْبِعُهُمُ الْآخِرِينَ ﴿١٧﴾
**मग आम्ही त्याच्यानंतर मागील लोकांस आणले[१] (१७)**

كَذَٰلِكَ نَفْعَلُ بِالْمُجْرِمِينَ ﴿١٨﴾
**आम्ही गुन्हेगारांबरोबर असेच करीत असतो.[२] (१८)**

وَيْلٌ يَوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِينَ ﴿١٩﴾
**त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यांस वैल (खेद) आहे. (१९)**

أَلَمْ نَخْلُقكُّم مِّن مَّاءٍ مَّهِينٍ ﴿٢٠﴾
**काय आम्ही तुम्हांस तुच्छ पाण्यापासून (वीर्याने) निर्माण केले नाही? (२०)**

فَجَعَلْنَاهُ فِي قَرَارٍ مَّكِينٍ ﴿٢١﴾
**मग आम्ही त्याला मजबुत आणि सुरक्षित जागेत ठेवले[३] (२१)**

إِلَىٰ قَدَرٍ مَّعْلُومٍ ﴿٢٢﴾
**एका निश्चित वेळपर्यंत[४] (२२)**

فَقَدَرْنَا فَنِعْمَ الْقَادِرُونَ ﴿٢٣﴾
**मग आम्ही अंदाज [५] केला आणि आम्ही चांगला अंदाज करणारे आहोत[६] (२३)**

وَيْلٌ يَوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِينَ ﴿٢٤﴾
**त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यांस दु:ख आहे. (२४)**

أَلَمْ نَجْعَلِ الْأَرْضَ كِفَاتًا ﴿٢٥﴾
**काय आम्ही जमिनीस सामावून घेणारी बनविली[७] नाही ? (२५)**

أَحْيَاءً وَأَمْوَاتًا ﴿٢٦﴾
**जित्यांना सुद्धा आणि मृतांना सुद्धा ? (२६)**

وَجَعَلْنَا فِيهَا رَوَاسِيَ شَامِخَاتٍ وَأَسْقَيْنَاكُم مَّاءً فُرَاتًا ﴿٢٧﴾
**आणि आम्ही तिच्यांत उंच उंच अचल पर्वत बनविले; आणि तुम्हांस तृप्त करणारे गोड पाणी पाजले. (२७)**

وَيْلٌ يَوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِينَ ﴿٢٨﴾
**त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यांस दु:ख आहे. (२८)**

انطَلِقُوا إِلَىٰ مَا كُنتُم بِهِ تُكَذِّبُونَ ﴿٢٩﴾
**त्या नरकाग्नीकडे जा, जिला तुम्ही खोटे ठरवीत होता.[८] (२९)**

انطَلِقُوا إِلَىٰ ظِلٍّ ذِي ثَلَاثِ شُعَبٍ ﴿٣٠﴾
**चला ! तीन शाखा असलेल्या सांवलीकडे[९] (३०)**

لَّا ظَلِيلٍ وَلَا يُغْنِي مِنَ اللَّهَبِ ﴿٣١﴾
**जीवास्तविक न सांवली देणारी आहे न ज्वालांपासून वांचवू शकते.[१०] (३१)**

إِنَّهَا تَرْمِي بِشَرَرٍ كَالْقَصْرِ ﴿٣٢﴾
**खचित्‌च नरकाग्नी (मोठमोठे) अंगारे फेकते, जे महालासारखे आहेत[११] (३२)**

१) म्हणजे मक्केचे काफिर आणि त्यांच्याच ओंजळीने पाणी पिणारे, ज्यांनी रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला खोटे ठरवले.

२) म्हणजे इहलोकांत किंवा परलोकांत शिक्षा देतो.

३) म्हणजे आईच्या पोटात.

४) म्हणजे गर्भारपणाच्या मुदतीपर्यंत सहा किंवा नऊ महिने.

५) म्हणजे आईच्या पोटांत शारीरिक जडण घडणचा बरोबर अंदाज केला की, दोन्ही डोळे, दोन्ही हात आणि दोन्ही पाय, आणि दोन्ही कानांच्या दर्म्यान आणि दुसऱ्या अवयवांचा एक दुसऱ्याच्या दर्म्यान किती अंतर असले पाहिजे.

६) म्हणजे जमीन आपल्या पाठीवर जित्यांना आणि मृतांना आपल्या आंत समाविष्ट (गोळा) करून घेते.

७) 'रवासी' 'रासियतुन' चे अनेकवचन आहे. सवाबित म्हणजे डोंगर 'शामिखात' म्हणजे उंच.

८) हे, देवदूत नर्कवासियांना म्हणतील.

९) नरकाग्नीपासून जो धूर निघेल, तो उंच जाऊन तीन दिशांत पसरून जाईल. म्हणजे ज्याप्रमाणे भिंत आणि वृक्षांची सांवली असते, ज्यांत मनुष्याला आराम आणि (उष्णतेपासून) सुरक्षितता जाणवते. हा धूर वास्तविक अशी सांवली असणार नाही. ज्यांत नर्कवासी काही स्वस्थता पावतील.

१०) म्हणजे नरकाग्नीच्या उष्णतेपासून वांचणे सुद्धा शक्य होणार नाही.

११) याचे आणखी एक भाषांतर आहे. जे लाकडाच्या आड्याप्रमाणे म्हणजे वजनदार तुकड्याप्रमाणे आहे. (मोठे आडवे लाकुड ज्याला आडेपण म्हणतात)

كَاَنَّهٗ جِمٰلَتٌ صُفْرٌ ﴿٣٣﴾
जणूंकी ते पिवळ्या रंगाचे उंट आहेत[१] (३३)

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ﴿٣٤﴾
आज या खोटे ठरवणाऱ्यास दु:ख आहे. (३४)

هٰذَا يَوْمُ لَا يَنْطِقُوْنَ ﴿٣٥﴾
आजचा दिवस तो दिवस आहे, की हे बोलू सुद्धा शकणार नाहीत.[२] (३५)

وَلَا يُؤْذَنُ لَهُمْ فَيَعْتَذِرُوْنَ ﴿٣٦﴾
न त्यांना कोण्या सबबीची परवानगी दिली जाईल.[३] (३६)

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ﴿٣٧﴾
आज खोटे ठरवणाऱ्यास दु:ख आहे. (३७)

هٰذَا يَوْمُ الْفَصْلِ ۚ جَمَعْنٰكُمْ وَالْاَوَّلِيْنَ ﴿٣٨﴾
हा आहे फैसल्याचा दिवस, आम्ही तुम्हास आणि पूर्वीच्या सर्व लोकांस एकत्र गोळा केले आहे.[४] (३८)

فَاِنْ كَانَ لَكُمْ كَيْدٌ فَكِيْدُوْنِ ﴿٣٩﴾
जर तुम्ही कोणी डाव माझ्यावर चालवू शकत असाल, तर चालवून घ्या[५] (३९)

१ ع ४० २१ وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ﴿٤٠﴾ ع ١ ٤٠ ٢١
त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यास दु:ख होय! (४०)

اِنَّ الْمُتَّقِيْنَ فِيْ ظِلٰلٍ وَّعُيُوْنٍ ﴿٤١﴾
नि:संशय, अल्लाहला भिऊन वागणारे लोक सावल्यात आणि वहात्या झऱ्यांत असतील[६] (४१)

وَّفَوَاكِهَ مِمَّا يَشْتَهُوْنَ ﴿٤٢﴾
आणि त्या फळांमध्ये असतील, ज्यांची त्यांना इच्छा होईल.[७] (४२)

كُلُوْا وَاشْرَبُوْا هَنِيْٓـئًا بِمَا كُنْتُمْ تَعْمَلُوْنَ ﴿٤٣﴾
(हे स्वर्गवासियांनो!) मजेने खा व प्या, आपल्या केलेल्या कर्मांच्या मोबदल्यांत![८] (४३)

اِنَّا كَذٰلِكَ نَجْزِي الْمُحْسِنِيْنَ ﴿٤٤﴾
खचित्‌च आम्ही सुकृत्य करणाऱ्यास असाच मोबदला देत असतो[९] (४४)

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ﴿٤٥﴾
त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यास दु:ख आहे.[१०] (४५)

كُلُوْا وَتَمَتَّعُوْا قَلِيْلًا اِنَّكُمْ مُّجْرِمُوْنَ ﴿٤٦﴾
(अहो खोटे ठरवणाऱ्यांनो, तुम्ही जगात) थोडेसे खाऊन घ्या, आणि फायदा उचलून घ्या. नि:संशय तुम्ही गुन्हेगार आहांत[११] (४६)

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ﴿٤٧﴾
कयामतच्या दिवसाला खोटे ठरवणाऱ्यांस सक्त दु:ख आहे. (४७)

وَاِذَا قِيْلَ لَهُمُ ارْكَعُوْا لَا يَرْكَعُوْنَ ﴿٤٨﴾
यांना जेव्हा सांगण्यात येते की, रुकूअ करून घ्या, तर करीत नाही[१२] (४८)

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ﴿٤٩﴾
त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यास दु:ख होय[१३] (४९)

२ ع १० २२ فَبِاَيِّ حَدِيْثٍ بَعْدَهٗ يُؤْمِنُوْنَ ﴿٥٠﴾ ع ٢ ١٠ ٢٢
आता या कुरआनानंतर, कोणत्या गोष्टीवर (हे) ईमान आणतील?[१४] (५०)

१) 'सुफर' 'अस्फर' (पिवळे) चे अनेकवचन आहे. परंतु अरबांमध्ये याचा उपयोग असवद (काळे) च्या अर्थातपण आहे. या अर्थाच्या आधारावर, अर्थ हा होईल की, याची एक एक चिंगारी (अंगारा) एवढी एवढी मोठी असेल जसे महाल किंवा किल्ला. मग प्रत्येक चिंगारीचे आणखी इतके मोठे मोठे तुकडे होऊन जातील, जसे उंट असतात.

२) हशरच्या मैदानांत काफिरांच्या वेगवेगळ्या अवस्था होतील. एक वेळ ती राहील की, ते तेथे सुद्धा खोटे बोलतील. मग अल्लाहतआला त्यांच्या तोंडावर मोहोर लावून टाकेल. आणि त्यांचे हाथ पाय साक्ष देतील. मग ज्यावेळी त्यांना नरकाग्नीत घेऊन जाण्यांत येईल. त्यावेळी व्याकुळता आणि परेशानीमुळे, त्यांची तोंडे काही बोलू शकणार नाही. काही म्हणतात की, ते बोलतील तर खरे, पण त्यांच्याजवळ काही प्रमाण असणार नाही. जणू त्यांना बोलताच येणार नाही. जसे आम्ही जगांत सुद्धा अशा माणसाच्या बाबतीत म्हणतो, ज्याच्याजवळ कोणी समाधान करणारे प्रमाण नसते, तो तर आमच्या समोर बोलूच शकला नाही.

३) अर्थ हा आहे की त्यांच्याजवळ पुढे करण्यासाठी कोणी योग्य सबबच असणार नाही. जिला ते पुढे करून सुटका

करून घेऊ शकतील.
४) हे अल्लाहतआला आपल्या सेवकांना संबोधित करेल की, आम्ही तुम्हास आपल्या परिपूर्ण सामर्थ्याने, फैसला करण्याकरीता एकाच मैदानात गोळा करून घेतले आहे.
५) ही सक्त धमकी आणि भिवविणे आहे की जर तुम्ही माझ्या पकडीपासून वाचू शकता आणि माझ्या हुकुमातून निघूंशकत असाल, तर वाचून आणि निघून दाखवा. परंतु तेथे कोणात ही शक्ती असेल? हे महावाक्य पण असेच आहे, जसे हे महावाक्य आहे, ''अहो जिन्नात आणि मनुष्यांच्या समूहांनो ! जर तुमच्यांत आकाश आणि पृथ्वीच्या हद्दीच्या बाहेर निघून जाण्याची शक्ती आहे, तर निघून पळा!'' (सू.अर्रहमान-३३)
६) म्हणजे वृक्ष आणि महालाच्या सांवल्या आगीच्या धुराच्या सांवल्या असणार नाही, जशा मुशरिक लोकांकरीता असतील.
७) प्रत्येक प्रकारची फळे, जेव्हा पण इच्छा करतील, येऊन हजर होतील.
८) हे उपकार म्हणून त्यांना सांगण्यांत येईल. 'बिमा कुन्तुम्' मध्ये 'बा' सबबी करीता आहे. म्हणजे स्वर्गाच्या या देणग्या, सुकृत्यामुळे तुम्हास मिळाल्या आहेत, जी तुम्ही जगांत करीत राहिलात. याचा अर्थ हा आहे की, अल्लाहच्या दयेला मिळविण्याचे साधन, ज्यामुळे मनुष्य स्वर्गांत दाखल होईल, चांगली कामे आहेत. जे लोक चांगल्या कर्मांशिवायच, अल्लाहच्या दया आणि क्षमेचे उम्मीदवार बनून जांतात, त्यांची उपमा अशी आहे, जसा कोणी जमिनीत नांगर चालवेल, आणि बी पेरल्याशिवाय, पिकाचा उम्मीदवार बनून जाईल. किंवा काट्याचे बी पेरून, चवदार फळांची आशा बाळगेल.
९) याच्यामध्ये सुद्धा याच हुकूमाची ताकीद आहे की, जर परलोकांत चांगल्या परिणामांचे इच्छुक आहांत, तर जगांत सुकृत्ये आणि भलाईचा मार्ग अनुसरा.
१०) की जे ईशभय बाळगतात त्यांच्या वाट्याला स्वर्गाच्या देणग्या याव्यांत, आणि त्यांच्या वाट्याला मोठे दुर्दैव.
११) हे कयामतला नाकारणाऱ्यांना संबोधन आहे. आणि हा हुकूम भिवविण्याला आणि धमकाविण्याला आहे. म्हणजे बरे ! आणखी काही दिवस चांगली मौजमजा करून घ्या! तुमच्यासारख्या अपराध्यांसाठी शिक्षेची पकड तयार आहे.
१२) म्हणजे जेव्हा त्यांना नमाज पढण्याचा हुकूम दिला जातो, तर नमाज पढत नाहीत.
१३) म्हणजे त्यांच्याकरीता जे अल्लाहच्या आदेशाला आणि मनाईला मानत नाही.
१४) म्हणजे जेव्हा या कुरआनावर ईमान आणणार नाही, तर याच्यानंतर आणखी कोणती वाणी आहे जिच्यावर हे ईमान आणतील? येथे पण हदीस या शब्दाचा वापर कुरआनाकरीता झाला आहे. जसे की आणखी सुद्धा काही ठिकाणी केले गेले आहे.

महावाक्ये ४० — (७८) सू. अन्नबा — रुकूअ २

آياتها ٤٠ (٧٨) سورة النبأ مكية (٨٠) ركوعاتها ٢

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

عَمَّ يَتَسَآءَلُوْنَ ۝١

हे लोक कोण्या गोष्टीची विचारपूस करीत आहे?(१) ①

عَنِ النَّبَاِ الْعَظِيْمِ ۝٢

त्या मोठ्या वृत्तांताची ②

الَّذِيْ هُمْ فِيْهِ مُخْتَلِفُوْنَ ۝٣

ज्याच्यांत हे भिन्न भिन्न आहेत.(२) ③

كَلَّا سَيَعْلَمُوْنَ ۝٤

खचित्‌च हे लवकरच जाणून घेतील. ④

ثُمَّ كَلَّا سَيَعْلَمُوْنَ ۝٥

आणि खचित्‌च त्यांना फारच लवकर माहित होऊन जाईल.(३) ⑤

اَلَمْ نَجْعَلِ الْاَرْضَ مِهٰدًا ۝٦

काय आम्ही जमिनीला बिछाईत बनविली नाही?(४) ⑥

وَّالْجِبَالَ اَوْتَادًا ۝٧

आणि पर्वतास मेखा (बनविल्या नाहीत?)(५) ⑦

وَّخَلَقْنٰكُمْ اَزْوَاجًا ۝٨

आणि आम्ही तुम्हांस जोडपी जोडपी निर्माण केले.(६) ⑧

وَّجَعَلْنَا نَوْمَكُمْ سُبَاتًا ۝٩

आणि आम्ही तुमच्या झोपेला विश्रांतीस कारणीभूत बनविले.(७) ⑨

१) जेव्हा रसूलुल्लाह ﷺ ला पैगंबरीची वस्त्रे प्रदान करण्यात आली. आणि आपण एकेश्वरवाद, कयामत वगैरेचे वर्णन केले. आणि कुरआनाचे पठण केले; तेव्हा काफिर आणि मुशरिक लोक आपसांत एक दुसऱ्याला विचारू लागले की, काय ही कयामत खरोखर घडून येणे शक्य आहे? जसा की हा मनुष्य दावा करीत आहे; किंवा हे कुरआन खरोखर अल्लाहकडून अवतरित झालेले आहे जसे की मुहम्मद (ﷺ) म्हणत आहेत. प्रश्न विचारून प्रथम अल्लाहतआलाने या गोष्टीची वास्तविकता ठळक केली, जी त्यांची आहे. मग स्वत:च उत्तर दिले की,.........

२) म्हणजे ज्या मोठ्या बातमीच्या बाबतीत, यांच्या दर्म्यान मतभेद आहे, त्याच्याशी संबंधित विचारपूस आहे. या मोठ्या बातमीने, काहींनी कुरआन मजीद अभिप्रेत धरले आहे. काफिर याच्या बाबतीत वेगवेगळ्या गोष्टी करीत असत. कोणी त्याला जादू, कोणी मंत्र तंत्र, कोणी काव्य, आणि कोणी पूर्वींच्या कहाण्या, सांगत होता. काहींच्या जवळ याच्याने अभिप्रेत कयामत घडून येणे आणि दुसऱ्यांदा जिवंत होणे आहे. यांत सुद्धा यांच्या दर्म्यान काही मतभेद होता. कोणी साफ नाकारत होता. कोणी फक्त शंका जाहीर करत होते. काही म्हणतात की, प्रश्न विचारणारे ईमानवाले आणि काफिर दोन्ही होते. ईमानवाल्यांचे विचारणे तर विश्वासांत वाढ, आणि अंतर्दृष्टीत वाढ व्हावी यासाठी होते आणि काफिरांचे उपहास आणि टवाळी करण्यासाठी होते.

३) हे तंबी करणे आणि भिवविणे आहे की, लवकरच सर्व काही ठाऊक होऊन जाईल. पुढे अल्लाहतआला आपले कौशल्य आणि महान सामर्थ्याचे वर्णन करीत आहे की, एकेश्वरवादाची वास्तविकता त्यांच्या समक्ष स्पष्ट होऊन जावी. आणि अल्लाहचा पैगंबर त्यांना ज्या गोष्टीचे आवाहन करीत आहे. त्याचेवर ईमान आणणे त्यांच्याकरीता सुलभ होऊन जावे.

४) म्हणजे तुम्ही बिछाईतीप्रमाणे, जमिनीवर चालता फिरतात, उठतात, बसतात, झोपतात, आणि सर्व कामकाज करतात. जमिनीला डोलणारी राहू दिले नाही.

५) 'अव्ताद' 'वत्द' चे अनेकवचन आहे, मेखा. म्हणजे पर्वतांना जमिनीकरीता मेखा बनविले जे की, जमिनीने स्थिर रहावे, तिने हलू नये. नाहीतर हालण्याने आणि डोलण्याने जमीन राहण्यांस योग्यच राहिली नसती.

६) म्हणजे पुल्लिंगी आणि स्त्रीलींगी, नर आणि मादी, किंवा जोडपी तऱ्हेतऱ्हेचे, रंगबेरंगी या अर्थांत आहे. म्हणजे वेगवेगळ्या स्वरुपांत आणि रंगात पैदा केले. सुंदर, कुरूप, उंच अंगकाठीचा, बुटका, गोरा आणि काळा वगैरे.

७) 'सुबात' चा अर्थ खंडीत करण्याचा आहे. रात्र सुद्धा मनुष्ये आणि प्राण्याच्या सर्व हालचाली खंडीत करून देते. की जेणेकडून विश्रांती घेतली जावी. आणि लोकांनी आरामाने झोपावे. किंवा अर्थ आहे की, रात्र तुमची कामे खंडीत करून टाकते. म्हणजे कर्मांच्या शृंखलेला संपवून टाकते. कर्म संपण्याचा अर्थ विश्रांती आहे.

وَّجَعَلۡنَا الَّيۡلَ لِبَاسًا ﴿١٠﴾
आणि रात्रीला आम्ही पडदा बनविले.(१) १०

وَّجَعَلۡنَا النَّهَارَ مَعَاشًا ﴿١١﴾
आणि दिवसाला उपजिविकेची (वेळ) बनविली.(२) ११

وَبَنَيۡنَا فَوۡقَكُمۡ سَبۡعًا شِدَادًا ﴿١٢﴾
आणि तुमच्यावर आम्ही सात मजबुत आकाशे बनविली.(३) १२

وَّجَعَلۡنَا سِرَاجًا وَّهَّاجًا ﴿١٣﴾
आणि एक चमकणारा प्रकाशमान दिवा बनविला.(४) १३

وَّاَنۡزَلۡنَا مِنَ الۡمُعۡصِرٰتِ مَآءً ثَجَّاجًا ﴿١٤﴾
आणि ढगातून आम्ही भरपूर वहाणारे पाणी वर्षविले.(५) १४

لِّنُخۡرِجَ بِهٖ حَبًّا وَّنَبَاتًا ﴿١٥﴾
जेणेकरून त्यापासून धान्य आणि वनस्पती उगवावी.(६) १५

وَّجَنّٰتٍ اَلۡفَافًا ﴿١٦﴾
आणि घनदाट बागा सुद्धा(७) (उगवाव्या) १६

اِنَّ يَوۡمَ الۡفَصۡلِ كَانَ مِيۡقَاتًا ﴿١٧﴾
नि:संशय निर्णयाच्या दिवसाचा वेळ निश्चित आहे.(८) १७

يَّوۡمَ يُنۡفَخُ فِى الصُّوۡرِ فَتَاۡتُوۡنَ اَفۡوَاجًا ﴿١٨﴾
ज्यादिवशी कर्णा फुंकला जाईल, मग तुम्ही सर्व घोळके घोळके बनून याल.(९) १८

وَّفُتِحَتِ السَّمَآءُ فَكَانَتۡ اَبۡوَابًا ﴿١٩﴾
आणि आकाश उघडून दिले जाईल, तर दरवाजेच दरवाजे होऊन जातील.(१०) १९

وَّسُيِّرَتِ الۡجِبَالُ فَكَانَتۡ سَرَابًا ﴿٢٠﴾
आणि पर्वत आपल्या जागेवरून चालविले जातील; मग ते पांढरी वाळू होऊन जातील.(११) २०

१) म्हणजे रात्रीचा अंध:कार आणि काळोख प्रत्येक वस्तुला आपल्या पदरांत लपवून घेतो. ज्याप्रमाणे पोषाख माणसाच्या शरीराला लपवून घेतो.

२) अर्थ आहे की, दिवसाला प्रकाशित बनविले. जेणे करून लोकांनी उपजिविका कमविण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्टा करू शकावी.

३) यांच्यातून प्रत्येकाचे अंतर पांचशे वर्षांच्या एवढे आहे. जे त्याच्या मजबुतीचे प्रमाण आहे.

४) याच्याने अभिप्रेत सूर्य आहे.

५) 'मुअ्सिरात' ते ढग जे पाण्याने भरलेले असावेत. परंतु अजून बरसलेले नसावेत. 'सज्जाजा' भरपूर वहाणारे पाणी.

६) 'हब्ब' (दाणा) ते धान्य ज्याला खाण्याकरीता साठा केला जातो. जसे, गहूं, तांदूळ, जव, मका वगैरे आणि 'नबात' वनस्पती आणि चारा वगैरे, जे जनावरे खातात.

७) 'अल्फाफा' भरपूर फांद्यांमुळे एक दुसऱ्याला भिडून गेलेले वृक्ष म्हणजे घनदाट बागा.

८) म्हणजे सुरवातीचे आणि शेवटचे सर्वांचा गोळा होण्याचा दिवस व वायद्याचा दिवस. त्याला निर्णयाचा दिवस यासाठी म्हटले की त्या दिवशी गोळा होण्याच्या दिवसाचा उद्देश्यच, सर्व मनुष्यांचा त्यांच्या कर्मांनुसार निर्णय करणे आहे.

९) काहींनी याचा भावार्थ हा सांगितला आहे की प्रत्येक जनसमूह आपल्या पैगंबराबरोबर हशरच्या मैदानांत येईल. हा दुसरा कर्णा (सूर) असेल. ज्याच्याने सर्व लोक थडग्यांतून जिवंत उठून निघून येतील. अल्लाहतआला आकाशांतून पाणी वर्षवील. ज्याच्याने मनुष्य शेतीसारखा उगवून जाईल.

१०) म्हणजे देवदूतांच्या उतरण्याकरीता मार्ग बनून जातील. आणि ते जमिनीवर उतरून येतील.

११) 'सराब' ती वाळू जी दुरून पाण्यासारखी वाटते (मृगजळ) डोंगर देखील सराव प्रमाणे दुरून दिसणारी वस्तू बनून राहतील. आणि याच्यानंतर बिल्कुल नेस्तनाबुद होऊन जातील. त्यांचे काही नामोनिशाण बाकी राहणार नाही. काही म्हणतात की, कुरआनांत पर्वतांच्या वेगवेगळ्या अवस्था सांगण्यांत आल्या आहेत. ज्यांचा एकत्रित सारांश असा आहे की, प्रथम त्यांना चूर्ण विचूर्ण करून देण्यात येईल. (सू.अल्हाक :१४) तसेच ते पिंजलेल्या कापसाप्रमाणे होऊन जातील. (सू.अलकार्या-५) (३) ते धुळधाण होऊन जातील (सू.वाकेआ-६) (४) त्यांना उडवून दिले जाईल. (सू.ताहा-१०५) पाचवे असे की ते सराब होऊन जातील म्हणजे जसे की या ठिकाणी सांगितले आहे.

إِنَّ جَهَنَّمَ كَانَتْ مِرْصَادًا ﴿٢١﴾
नि:संशय नरकाग्नी पाळतीतच लागून आहे.[१] ㉑

لِّلطَّاغِينَ مَآبًا ﴿٢٢﴾
तेच शिरजोरांचे ठिकाण आहे. ㉒

لَّابِثِينَ فِيهَا أَحْقَابًا ﴿٢٣﴾
त्यांतच ते युगान युगे पडून राहतील.[२] ㉓

لَّا يَذُوقُونَ فِيهَا بَرْدًا وَلَا شَرَابًا ﴿٢٤﴾
तेथे कधी थंडाईची मजा चाखणार नाही न पाण्याची ㉔

إِلَّا حَمِيمًا وَغَسَّاقًا ﴿٢٥﴾
शिवाय (उकळी आलेले) गरम पाणी आणि (वहात्या) पुवा शिवाय[३] ㉕

جَزَاءً وِفَاقًا ﴿٢٦﴾
(त्यांना) पुरा पुरा मोबदला मिळेल.[४] ㉖

إِنَّهُمْ كَانُوا لَا يَرْجُونَ حِسَابًا ﴿٢٧﴾
नि:संशय त्यांना तर हिशेबाची आकांक्षाच नव्हती.[५] ㉗

وَكَذَّبُوا بِآيَاتِنَا كِذَّابًا ﴿٢٨﴾
आणि धिटाईने आमच्या महावाक्यांना खोटे ठरवीत होते. ㉘

وَكُلَّ شَيْءٍ أَحْصَيْنَاهُ كِتَابًا ﴿٢٩﴾
आणि आम्ही प्रत्येक गोष्टीला लिहून सुरक्षित ठेवले आहे.[६] ㉙

فَذُوقُوا فَلَن نَّزِيدَكُمْ إِلَّا عَذَابًا ﴿٣٠﴾
आता तुम्ही (आपल्या केल्याचा) मजा चाखा. आम्ही तुमची शिक्षा वाढवितच जाऊ.[७] ㉚

إِنَّ لِلْمُتَّقِينَ مَفَازًا ﴿٣١﴾
नि:संशय अल्लाहला भिऊन वागणाऱ्यांसाठी सफलता आहे.[८] ㉛

حَدَائِقَ وَأَعْنَابًا ﴿٣٢﴾
बागा आहेत आणि द्राक्षे आहेत. ㉜

وَكَوَاعِبَ أَتْرَابًا ﴿٣٣﴾
आणि नवतरूण कुंवाऱ्या समान वयाच्या स्त्रिया आहेत.[९] ㉝

१) घात अशा जागेला म्हणतात जेथे लपून शत्रुची वाट पाहिली जाते की, तेथून जाईल तर लगेच त्याच्यावर हल्ला करून दिला जावा. नरकाग्नीचे पहारेकरी सुद्धा, नर्कवासियांच्या प्रतिक्षेत असेच बसले आहेत. किंवा स्वत: नरकाग्नी अल्लाहच्या हुकूमाने काफिरांच्या पाळतीवर बसली आहे.

२) 'अहकाब' 'हुकूब' चे अनेकवचन आहे.काळाच्या अर्थात अभिप्रेत युगानुयुगे आणि नित्याचे आहे. युगानुयुगे ते नरकाग्नीतच राहतील. ही शिक्षा काफिर आणि मुशरिक लोकांकरीता आहे.

३) हे नर्कवासियांच्या शरीरांतून निघेल.

४) म्हणजे ही शिक्षा त्यांच्या त्या कर्मांप्रमाणे आहे, जे ते जगात करीत राहिले आहेत.

५) हे पहिल्या वाक्याचे कारण सांगण्यात येत आहे. म्हणजे ते चर्चित शिक्षेला यासाठी पात्र ठरतील की ते मृत्यूनंतर पुन्हा जिवंत होऊन उठण्याच्या धारणेला मान्य करणारे नव्हते की हिशेब घेण्याची त्यांनी आशा बाळगावी.

६) म्हणजे लौहे महफूज मध्ये किंवा ते रेकॉर्ड अभिप्रेत आहे, जे देवदूत लिहीत राहिले. पहिला भावार्थ जास्त बरोबर आहे. जसे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''आणि आम्ही प्रत्येक गोष्टीला एका स्पष्ट पुस्तकात संग्रहीत करून दिले आहे.'' (सू.यासीन-१२)

७) शिक्षा वाढविण्याचा अर्थ आहे की, आता या शिक्षा कायम स्वरुपी आहेत. ''जेव्हा त्याच्या कातड्या गळून जातील, तर दुसऱ्या बदलून दिल्या जातील.'' (सू.निसा-५६) ''जेव्हा आग विझू लागेल, तेव्हा पुन्हा भडकावली जाईल.'' (सू.बनी इस्राईल.-९७)

८) दुर्दैवी लोकांच्या चर्चेनंतर, ही सुदैवी लोकांची चर्चा आणि त्या देणग्यांचे वर्णन आहे, ज्या पारलौकीक जीवनांत त्यांना भेटतील. हे साफल्य आणि देणग्या त्यांना अल्लाहला भिऊन वागण्यामुळे मिळतील ईमान आणि आज्ञापालनाच्या तगाद्यांना पूर्ण करण्याचे नांव तकवा आहे. भाग्यवंत आहेत ते लोक, जे ईमान आणल्यानंतर, ईशभय आणि सुकृत्ये करण्याची काळजी घेतात. (अल्लाहतआला आम्हाला त्यातून बनवो)

९) 'कवाईब' 'काओबितुन' चे अनेकवचन आहे हे 'कअब' (घोट्या) ने आहे. ज्याप्रमाणे घोटा उंचावलेला असतो, त्यांच्या छातीत पण असाच उभार असेल. जे त्यांच्या रुप सौंदर्याचे एक दर्शक आहे. 'अत्राब' समान वयाच्या

وَّكَاْسًا دِهَاقًا ﴿٣٤﴾

आणि ओतप्रोत भरलेले मद्याचे पेले आहेत.[१] ३४

لَا يَسْمَعُوْنَ فِيْهَا لَغْوًا وَّلَا كِذّٰبًا ﴿٣٥﴾

तेथे न ते निरर्थक गोष्टी ऐकतील आणि न खोट्या गोष्टी ऐकतील.[२] ३५

جَزَآءً مِّنْ رَّبِّكَ عَطَآءً حِسَابًا ﴿٣٦﴾

(त्यांना) त्यांच्या पालनकर्त्याकडून (त्यांच्या सुकृत्यांचा) हा मोबदला मिळेल जे पुरेसे ईनाम होईल.[३] ३६

رَّبِّ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ وَمَا بَيْنَهُمَا الرَّحْمٰنِ لَا يَمْلِكُوْنَ مِنْهُ خِطَابًا ﴿٣٧﴾

(त्या पालनकर्त्याकडून मिळेल जो) आकाश आणि पृथ्वीचा, आणि जे काही त्यांच्या दर्म्यान आहे, त्यांचा पालनकर्ता आहे आणि मोठा क्षमाकर्ता आहे; कोणालाही त्याच्याशी बोलण्याचा अधिकार असणार नाही.[४] ३७

يَوْمَ يَقُوْمُ الرُّوْحُ وَالْمَلٰٓئِكَةُ صَفًّا لَّا يَتَكَلَّمُوْنَ اِلَّا مَنْ اَذِنَ لَهُ الرَّحْمٰنُ وَقَالَ صَوَابًا ﴿٣٨﴾

ज्या दिवशी रूह (म्हणजे जिब्रईल) आणि देवदूत रांगा बनवून उभे असतील.[५] तर कोणी बोलू शकणार नाही. परंतु ज्याला रहमान परवानगी देऊन देईल, आणि तो योग्य गोष्टच बोलेल[६] ३८

ذٰلِكَ الْيَوْمُ الْحَقُّ فَمَنْ شَآءَ اتَّخَذَ اِلٰى رَبِّهٖ مَاٰبًا ﴿٣٩﴾

हा दिवस सत्य आहे;[७] आता जो इच्छील, त्याने आपल्या पालनकर्त्याजवळ (सुकृत्ये करून) ठिकाण बनवून घ्यावे.[८] ३९

اِنَّآ اَنْذَرْنٰكُمْ عَذَابًا قَرِيْبًا يَّوْمَ يَنْظُرُ الْمَرْءُ مَا قَدَّمَتْ يَدٰهُ
وَيَقُوْلُ الْكٰفِرُ يٰلَيْتَنِيْ كُنْتُ تُرٰبًا ﴿٤٠﴾ ٢ ع ١٠ ٢

आम्ही तुम्हास लवकरच येणाऱ्या शिक्षेपासून भिववून दिले (आणि सावध करून दिले) आहे.[९] ज्या दिवशी मनुष्य आपल्या हाताची कमाई पाहून घेईल[१०] आणि काफिर म्हणेल की, अरेरे! जर मी माती
२ ع १० २ बनून गेलो असतो![११] ४०

१) 'देहाका' भरलेले, किंवा सतत, एका नंतर एक किंवा स्वच्छ स्फटिकासमान, 'कास' अशा पेल्याला म्हणतात, जो काठोकाठ भरलेला असावा.

२) म्हणजे कोणी फायदा नसलेली आणि निरर्थक गोष्ट तेथे होणार नाही. आणि न एक दुसऱ्याशी खोटे बोलतील.

३) 'अता' च्या बरोबर हिसाब अतिशयोक्तीसाठी येत असतो. म्हणजे अल्लाहच्या देणग्या आणि इमानांची तेथे लयलुट असेल.

४) म्हणजे त्याची महानता, हैबत आणि शान इतकी असेल की, सुरवातीला कोणाची त्याच्याशी बोलण्याची हिंमत होणार नाही. म्हणून त्याच्या परवानगीशिवाय कोणी शिफारशी करीता तोंडपण उघडू शकणार नाही;

५) इमाम इब्ने कसीर जवळ 'रुह' ने अभिप्रेत मनुष्य आहे.

६) ही परवानगी अल्लाहतआला त्या देवदूतांना आणि आपल्या पैगंबरांना बहाल करील आणि ते जे बोल बोलतील ते सत्य आणि चांगले असेल किंवा हा भावार्थ आहे की, परवानगी फक्त त्याच्याच बाबतीत दिली जाईल, ज्याने योग्य गोष्ट केली असेल. म्हणजे कलमा तौहीदला मान्य करणारा राहिला असावा.

७) म्हणजे अवश्य येणारा.

८) म्हणजे या येणाऱ्या दिवसाला दृष्टीसमोर ठेवून ईमान आणि ईशभयाचे जीवन अंगीकारावे. जेणे करून, त्या दिवशी त्याला तेथे चांगले ठिकाण मिळून जावे.

९) म्हणजे कयामतच्या दिवसाच्या शिक्षेपासून, जो जवळच आहे. कारण की याच्या येण्याची पूर्ण खात्री आहे. आणि प्रत्येक येणारी गोष्ट जवळच आहे. कारण की कुठल्याही प्रकारे तो येऊनच राहणार आहे.

१०) म्हणजे चांगला किंवा वाईट, जे कर्मपण जगांत त्याने केले, ते अल्लाहजवळ पोहचून गेले आहे. कयामतच्या दिवशी ते त्याच्यापुढे येऊन जाईल. आणि त्याला तो डोळ्यांनी पाहून घेईल. ''जे काही त्यांनी केले होते, सर्व हजर पावतील.'' (सू.कहफ-४९) ''त्या दिवशी मनुष्याला सर्वकाही केलेले कृत्ये आठवून दिले जातील. (सू.कियाम:-१३)

११) म्हणजे तो जेव्हा आपल्या करीतांभयानक शिक्षा पाहील, तेव्हा ही आकांक्षा करेल. काही म्हणतात की, अल्लाहतआला जनावरांत सुद्धा न्यायानुसार निर्णय करील. येथपावेतो की, शिंगवाल्या बकरीने, शिंग नसलेल्या बकरीवर कोणी अत्याचार केला असेल, तर त्याचापण बदला देववील. यातून मोकळे झाल्यानंतर, अल्लाहतआला जनावरांना हुकूम देईल की, माती होऊन जा ! तेव्हा ते माती होऊन जातील. यावेळी काफिर पण आकांक्षा करतील की अरेरे ! ते पण जनावरे असते आणि आज माती बनून गेले असते, (तफसीर इब्ने कसीर)

महावाक्ये ४६ | (७९) सू. अन्नाजेआत | रुकूअ २

آياتها ٣٦ | (٧٩) سُوْرَةُ النّٰزِعٰتِ مَكِّيَّةٌ (٨١) | رُكُوْعَاتُهَا ٢

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावानें मी आरंभ करतो

وَالنّٰزِعٰتِ غَرْقًا ۙ﴿١﴾
डुबून (मनुष्याच्या आत घुसून) सक्तीने खेचून काढणाऱ्यांची शपथ[१] ①

وَّالنّٰشِطٰتِ نَشْطًا ۙ﴿٢﴾
बंद उघडून सोडवून देणाऱ्यांची शपथ[२] ②

وَّالسّٰبِحٰتِ سَبْحًا ۙ﴿٣﴾
आणि पोहत पोहत फिरणाऱ्यांची शपथ[३] ③

فَالسّٰبِقٰتِ سَبْقًا ۙ﴿٤﴾
मग धांवत जाऊन पुढे सरसावून जाणाऱ्यांची शपथ[४] ④

فَالْمُدَبِّرٰتِ اَمْرًا ۘ﴿٥﴾
मग कामाची युक्ती करणाऱ्यांची शपथ[५] ⑤

يَوْمَ تَرْجُفُ الرَّاجِفَةُ ۙ﴿٦﴾
ज्या दिवशी (थरथर) कांपणारी (थरथर) कापेल[६] ⑥

تَتْبَعُهَا الرَّادِفَةُ ۗ﴿٧﴾
याच्यानंतर एक मागे येणारी (मागेमागे) येईल.[७] ⑦

قُلُوْبٌ يَّوْمَئِذٍ وَّاجِفَةٌ ۙ﴿٨﴾
(पुष्कळशी) अंत:करणे त्या दिवशी धडपडत असतील.[८] ⑧

اَبْصَارُهَا خَاشِعَةٌ ۘ﴿٩﴾
ज्यांचे डोळे खाली नमलेले असतील.[९] ⑨

१) 'नजऊन' चा अर्थ सक्तीने खेंचणे, 'गर्कन', बुडून. हे प्राण हरण करणाऱ्या देवदूतांचे वैशिष्ट्य आहे. देवदूत काफिरांचे प्राण फारच सक्तीने काढतात. आणि शरीरांत बुडून (काढतात)

२) 'नश्त' चा अर्थ गांठ सोडवून देणे. म्हणजे ईमानवाल्यांचे प्राण देवदूत सुलभतेने हरण करतात. जशी की कोण्या वस्तूंची गांठ सोडवून देण्यांत यावी.

३) 'सबह' चा अर्थ पोहणे. देवदूत प्राण हरण करण्याकरीता मनुष्याच्या शरीरांत अशा प्रकारे पोहत फिरतात, जसा पाणबुड्या समुद्रांतून मोती काढण्यासाठी समुद्राच्या खोलीत पोहतो किंवा अर्थ आहे की फारच जलद् गतीने अल्लाहचा हुकूम घेऊन, आकाशांतून उतरतात कारण की, जलद् धावणाऱ्या घोड्याला सुद्धा 'साबेहून्' म्हणतात.

४) हे देवदूत अल्लाहचे वह्य, पैगंबरांपर्यंत धांवून जाऊन पोहचवितात कारण की शैतानाला याची काही कुणकुण लागू नये. किंवा ईमानवाल्यांचे प्राण स्वर्गाकडे घेऊन जाण्यांत, फारच स्फूर्तीने काम करतात.

५) म्हणजे अल्लाहतआला जे काम त्यांच्या सुपूर्द करतो, ते, पार पाडण्याची व्यवस्था करतात. खरा युक्तीवान तर अल्लाहतआलाच आहे. परंतु जेव्हा अल्लाहतआला आपल्या परिपूर्ण ज्ञानाअंतर्गत, देवदूतांच्या मार्फत काम करवितो, तर तेव्हा त्यांना पण व्यवस्थापक म्हटले जाते. या अनुषंगाने ही पांच ही वैशिष्ट्ये देवदूतांची आहेत. आणि या देवदूतांची शपथ अल्लाहतआलाने वाहिली आहे. शपथेचे उत्तर महजुफ आहे. म्हणजे, ''तुम्ही अवश्य जिवंत केले जाल; आणि तुम्हास तुमच्या कर्माच्या बाबतीत विद्वीत केले जाईल.'' कुरआन ने या जिवंत होऊन उठण्याला आणि कर्मांच्या मोबदल्यांकरीता, कित्येक ठिकाणी शपथ वाहिली आहे. जसे सू.तगाबून-७ मध्ये सुद्धा, अल्लाहतआलाने शपथ वाहून चर्चित शब्दांमध्ये, या वास्तविकतेला सांगितले आहे. हे पुन्हा उठणे आणि मोबदला मिळणे केव्हा होईल? याचा खुलासा पुढे सांगितला आहे.

६) हा पहिला सूर आहे. ज्याला नष्ट करणारा सूर म्हणतात. ज्याच्याने सारे ब्रम्हांड कांपून आणि थरथरून उठेल. आणि प्रत्येक वस्तू नष्ट होऊन जाईल.

७) हा दुसरा सूर असेल. ज्याच्याने सर्व लोक जिवंत होऊन कबरींतून निघून येतील. हा दूसरा सूर पहिल्या सुरानंतर चाळीस वर्षांनी होईल. त्याला 'राद्फि:' यासाठी म्हटले आहे, की हा पहिल्या सुरानंतरच होईल. म्हणजे दुसरा सूर, पहिल्या सुराच्या मागे येणारा.

८) कयामतचे भयानतेमुळे.

९) म्हणजे अशा दहशतीमुळे लोकांच्या नजरा सुद्धा अपराध्यांसारख्या झुकलेल्या असतील.

يَقُولُونَ أَإِنَّا لَمَرْدُودُونَ فِي الْحَافِرَةِ ﴿١٠﴾

**म्हणतात की काय आम्ही पहिल्या सारख्या अवस्थेकडे पुन्हा परतविले जाऊ?[१] (१०)**

أَإِذَا كُنَّا عِظَامًا نَخِرَةً ﴿١١﴾

**काय त्या वेळी जेव्हा आम्ही पोकळ हाडे होऊन जाऊ?[२] (११)**

قَالُوا تِلْكَ إِذًا كَرَّةٌ خَاسِرَةٌ ﴿١٢﴾

**ते म्हणतात की, मग तर असे परतणे नुकसानकारक आहे.[३] (१२)**

فَإِنَّمَا هِيَ زَجْرَةٌ وَاحِدَةٌ ﴿١٣﴾

**(ठाऊक झाले पाहिजे) ते तर फक्त एक (भयानक) दटावणे आहे. (१३)**

فَإِذَا هُمْ بِالسَّاهِرَةِ ﴿١٤﴾

**की (ज्याच्या निर्माण होताच) ते एकदम मैदानांत जमा होऊन जातील.[४] (१४)**

هَلْ أَتَاكَ حَدِيثُ مُوسَىٰ ﴿١٥﴾

**काय मूसा (अ.) चा वृत्तांत पण तुला ठाऊक आहे? (१५)**

إِذْ نَادَاهُ رَبُّهُ بِالْوَادِ الْمُقَدَّسِ طُوًى ﴿١٦﴾

**जेव्हा की त्यांना त्यांच्या पालनकर्त्याने 'तूवा' च्या पवित्र मैदानात हांक मारली[५] (१६)**

اذْهَبْ إِلَىٰ فِرْعَوْنَ إِنَّهُ طَغَىٰ ﴿١٧﴾

**की तुम्ही फिरऔनकडे जा, त्याने फारच शिरजोरी अंगिकारली आहे.[६] (१७)**

فَقُلْ هَلْ لَكَ إِلَىٰ أَنْ تَزَكَّىٰ ﴿١٨﴾

**त्याला सांगा की काय तूं आपली शुद्धी आणि सुधारणा करू इच्छितो[७] (१८)**

وَأَهْدِيَكَ إِلَىٰ رَبِّكَ فَتَخْشَىٰ ﴿١٩﴾

**आणि हे की, मी तुला तुझ्या पालनकर्त्याचा मार्ग दाखवावा; जेणेकरून तूं(त्याला) भिऊ लागावेस.[८] (१९)**

فَأَرَاهُ الْآيَةَ الْكُبْرَىٰ ﴿٢٠﴾

**तर त्याला मोठा चमत्कार दाखविला.[९] (२०)**

१) 'हाफिर:' पहिल्या स्थितीला म्हणतात. हे कयामतला नाकारणाऱ्यांचे म्हणणे आहे. काय आम्ही अशाच प्रकारे जिवंत करून दिले जाऊ. ज्याप्रमाणे मृत्यूच्या पूर्वी होतो ?

२) हे कयामतला नाकारणाऱ्यांचे आणखी कथन आहे की, आम्ही कशाप्रकारे जिवंत करून दिले जाऊं, जेव्हा की आमची हाडे जीर्ण आणि चुरा चुरा होऊन जातील ?

३) म्हणजे जर खरोखर असे झाले, जसे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) म्हणतात, तर हे दुसऱ्यांदा जीवन आमच्याकरीता फारच नुकसानकारक होईल.

४) 'साहिर:' ने अभिप्रेत जमिनीचा पृष्ठ भाग म्हणजे मैदान आहे. जमिनीच्या पृष्ठभागाला 'साहिर:' यासाठी म्हटले गेले आहे की, सर्व प्राण्याचे झोपणे आणि जागे होणे याच जमिनीवर होते. काही म्हणतात की, सपाट मैदान आणि वाळवंटात भीतीमुळे माणसाची झोप उडून जाते. आणि तेथे तो जागा रहातो. म्हणून 'साहीर:' म्हणविला जातो. (फत्हूल कदीर) वास्तविक, हे कयामतचे चित्र रेखाटलेले आहे. की एकाच सूर फुंकण्यांत, सर्व लोक एका मैदानांत गोळा होऊन जातील.

५) ही त्यावेळची घटना आहे जेव्हा ह.मूसा عليه السلام मदयनहून परतल्यावर आगीच्या शोधात तूर पर्वतावर पोहचून गेले. तेव्हा तेथे एका झाडातून अल्लाहतआलाने ह.मूसा عليه السلام बरोबर संभाषण केले. जसा की याचा तपशील सू.ताहाच्या सुरवातीला येऊन चुकला . 'तुवा' याच जागेचे नाव आहे. त्यांच्या बरोबर संभाषण करण्याचा अर्थ, पैगंबरी बहाल करण्याचा आहे. म्हणजे ह.मूसा عليه السلام आग घेण्यासाठी गेले, आणि अल्लाहतआलाने त्यांना पैगंबरी बहाल करून दिली. म्हणून पुढे सांगितले.

६) म्हणजे कुफ्र, गुन्ह्यांत आणि गर्वांत मर्यादेच्या बाहेर निघून गेला आहे.

७) म्हणजे काय तूंअसा मार्ग आणि पद्धत पसंत करतो, ज्यामुळे तुझी सुधारणा होऊन जावी; आणि तो हा आहे की, मुसलमान आणि आज्ञाधीन होऊन जा.

८) म्हणजे त्याचा एकेश्वरवाद आणि उपासनेचा मार्ग, कारण की तू त्याच्या शिक्षेपासून भ्यावे. कारण की, अल्लाहचे भय त्याच अंत:करणांत निर्माण होते, जे हिदायतवर चालणारे असते.

९) म्हणजे आपल्या सत्यतेची ती प्रमाणे सादर केली, जी अल्लाहकडून त्यांना बहाल करण्यात आली होती. काही म्हणतात याच्याने अभिप्रेत ते चमत्कार आहेत, जे हजरत मूसा عليه السلام ला दिले गेले होते. उदा. यदे बयजा आणि असा (काठी) आणि काही जवळ नऊ निशाण्या आहेत.

| | |
|---|---|
| **तरी तो खोटे ठरवत राहिला आणि आज्ञाभंग करीत राहिला.** [१] ㉑ | فَكَذَّبَ وَعَصٰى ﴿٢١﴾ |
| **मग पालटला धावपळ करत.** [२] ㉒ | ثُمَّ اَدْبَرَ يَسْعٰى ﴿٢٢﴾ |
| **मग सर्वांना गोळा करून, मोठ्या आवाजांत म्हणू लागला की** [३] ㉓ | فَحَشَرَ فَنَادٰى ﴿٢٣﴾ |
| **तुम्हा सर्वांचा पालनकर्ता मीच आहे.** ㉔ | فَقَالَ اَنَا رَبُّكُمُ الْاَعْلٰى ﴿٢٤﴾ |
| **तेव्हा (सर्वांत उच्च) श्रेष्ठ अल्लाहने सुद्धा त्याला इहलोक आणि परलोकाच्या शिक्षेत पकडले.** [४] ㉕ | فَاَخَذَهُ اللّٰهُ نَكَالَ الْاٰخِرَةِ وَ الْاُوْلٰى ﴿٢٥﴾ |
| **नि:संशय याच्यांत त्या माणसाकरीता धडा आहे जो (अल्लाहला) भित असेल** [५] ㉖ | اِنَّ فِيْ ذٰلِكَ لَعِبْرَةً لِّمَنْ يَّخْشٰى ﴿٢٦﴾ ع |
| **काय तुमचे पैदा करणे कठीण आहे की, आकाशाचे?** [६] **ज्याला अल्लाहतआलाने बनविले** ㉗ | ءَاَنْتُمْ اَشَدُّ خَلْقًا اَمِ السَّمَآءُ ۭ بَنٰىهَا ﴿٢٧﴾ |
| **त्याची उंची खूप उभारली, मग त्याला ठीक ठाक केले.** [७] ㉘ | رَفَعَ سَمْكَهَا فَسَوّٰىهَا ﴿٢٨﴾ |
| **त्याच्या रात्रीला काळोखी आणि त्याच्या दिवसाला प्रकाशित बनविले** [८] ㉙ | وَاَغْطَشَ لَيْلَهَا وَاَخْرَجَ ضُحٰىهَا ﴿٢٩﴾ |
| **आणि याच्यानंतर जमिनीला (सपाट) अंथरुन दिले.** [९] ㉚ | وَالْاَرْضَ بَعْدَ ذٰلِكَ دَحٰىهَا ﴿٣٠﴾ |

१) परंतु या प्रमाणे आणि चमत्कारांचा त्याच्यावर काही परिणाम झाला नाही. आणि खोटे ठरवणे आणि आज्ञाभंगाच्या मार्गावरच तो चालत राहिला.

२) म्हणजे त्याने ईमान आणि आज्ञाभंगापासून तोंडच फिरविले नाही; किंबहुना मुलखांत फिसाद फैलावित आणि ह.मूसा عليه السلام शी सामना करण्याचा प्रयत्न करीत राहिला. म्हणून जादूगीरांना एकत्र गोळा करून त्यांचा मुकाबला ह.मूसा عليه السلام शी करविला. जेणेकरून ह.मूसा عليه السلام ला लबाड ठरविले जावे.

३) आपल्या लोकांना किंवा युद्ध लढाई करीतांआपल्या सैन्याला किंवा जादुगीरांना सामन्यासाठी गोळा केले आणि दुराग्रहावर अडून राहून आपणच महान पालनकर्ता असल्याची घोषणा केली.

४) म्हणजे अल्लाहने त्याची अशी पकड केली की, जगांत यापुढे येणाऱ्या धर्माविरुद्ध बंड करणाऱ्यांसाठी एक बोध घेण्यासारखा धडा बनवून दिले. आणि कयामतची शिक्षा वेगळी आहे. जी त्याला तेथे भेटेल.

५) यांत नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमकरीता सांत्वना आहे. आणि मक्केच्या काफिरांना तंबी आहे. जर त्यांनी मागील लोकांच्या वृत्तांतापासून बोध घेतला नाही, तर त्यांचा परिणाम सुद्धा फिरऔनाप्रमाणे होऊं शकतो.

६) हे मक्केच्या काफिरांना संबोधन आहे आणि उद्देश्य तंबी आणि कानउघाडणी आहे की जो अल्लाह इतक्या मोठ्या आकाशाला आणि त्याच्या चित्र विचित्र गोष्टींना निर्माण करू शकतो, त्याच्याकरीता तुमचे दुसऱ्यांदा जिवंत करून देणे कोणते कठीण आहे ? काय तुम्हांस दुसऱ्यांदा पैदा करणे, आकाशाच्या बनविण्यापेक्षा जास्त कठीण आहे?

७) काहींनी 'समक' चा अर्थ छत पण केला आहे; ठीक ठाक करण्याचा अर्थ त्याला अशा चेहऱ्या मोहऱ्यांत ढाळणे आहे, ज्याच्यात कोणी फरक, वक्रता, तडा, आणि ओबड धोबडपणा बाकी न राहून जावा.

८) अर्थ आहे की, दिवसाला सूर्यामार्फत प्रकाशित केले.

९) हे हाम-मीम-सजदः- ९ मध्ये येऊन चुकले आहे की 'खलक' (निर्मिती) आणखी गोष्ट आहे आणि 'दहा' (सपाट करणे) आणखी गोष्ट आहे. पृथ्वीची निर्मिती आकाशापूर्वी झाली आहे; परंतु इला सपाट आकाशाच्या निर्मिती नंतर केले.आणि येथे या वास्तविकतेचे वर्णन आहे. आणि सपाट करणे किंवा पसरविण्याचा अर्थ आहे की जमिनीला रहाण्या योग्य बनविण्याकरीता, ज्या ज्या गोष्टींची आवश्यकता आहे, अल्लाहने त्यांची व्यवस्था केली. उदाहरणार्थ जमिनीतून पाणी काढले, इच्यांत चारा आणि खाद्य पैदा केले. पर्वतांना मेखांप्रमाणे मजबुत रोवून दिले की, जमिनीने हलू नये. जसे की येथे सुद्धा पुढे हेच वर्णन आहे.

أَخْرَجَ مِنْهَا مَآءَهَا وَمَرْعٰىهَا ٣١
इच्यातून पाणी आणि चारा काढला. ३१

وَالْجِبَالَ أَرْسٰىهَا ٣٢
आणि पर्वतांना (मजबुत) रोंवून दिले. ३२

مَتَاعًا لَّكُمْ وَلِأَنْعَامِكُمْ ٣٣
हे सर्व तुमच्या आणि तुमच्या जनावरांच्या फायद्यासाठी (आहे.) ३३

فَإِذَا جَآءَتِ الطَّآمَّةُ الْكُبْرٰى ٣٤
तर जेव्हा ती मोठी आपत्ती (कयामत) येऊन पडेल ३४

يَوْمَ يَتَذَكَّرُ الْإِنْسَانُ مَا سَعٰى ٣٥
ज्या दिवशी की, मनुष्य आपल्या केलेल्या कर्मांची आठवण करील. ३५

وَبُرِّزَتِ الْجَحِيمُ لِمَنْ يَّرٰى ٣٦
आणि (प्रत्येक) पहाणाऱ्याच्या समोर नरकाग्नी जाहीर केला जाईल[१] ३६

فَأَمَّا مَنْ طَغٰى ٣٧
तर ज्या (मनुष्या) ने शिरजोरी केली असेल.[२] ३७

وَآثَرَ الْحَيٰوةَ الدُّنْيَا ٣٨
आणि इहलौकीक आयुष्यांस प्राधान्य दिले (असेल)[३] ३८

فَإِنَّ الْجَحِيمَ هِيَ الْمَأْوٰى ٣٩
(त्याचे) ठिकाण नरकाग्नीच आहे.[४] ३९

وَأَمَّا مَنْ خَافَ مَقَامَ رَبِّهِ وَنَهَى النَّفْسَ عَنِ الْهَوٰى ٤٠
होय! परंतु जो मनुष्य आपल्या पालनकर्त्यासमोर उभे रहाण्यापासून[५] भीत राहीला असेल. आणि आपल्या मनोकामनेपासून आत्मसंयमन करीत राहिला[६] असेल. ४०

فَإِنَّ الْجَنَّةَ هِيَ الْمَأْوٰى ٤١
तर त्याचे ठिकाण स्वर्गच आहे.[७] ४१

يَسْـَٔلُونَكَ عَنِ السَّاعَةِ أَيَّانَ مُرْسٰىهَا ٤٢
लोक आपल्याजवळ कयामतच्या कायम होण्याच्या वेळेची चौकशी करतात.[८] ४२

فِيمَ أَنْتَ مِنْ ذِكْرٰىهَا ٤٣
आपला हे सांगण्याशी काय संबंध?[९] ४३

إِلٰى رَبِّكَ مُنْتَهٰىهَا ٤٤
त्याच्या ज्ञानाची परिसीमा तर अल्लाहकडेच आहे ४४

إِنَّمَآ أَنْتَ مُنْذِرُ مَنْ يَّخْشٰىهَا ٤٥
आपण तर फक्त त्याला भीत रहाणाऱ्यांना सावध करणारे आहात[१०] ४५

१) म्हणजे काफिरांच्या पुढे करून दिली जाईल. कारण की त्यांनी पाहून घ्यावे की, त्यांचे आता कायमचे ठिकाण नरकाग्नी आहे. काही म्हणतात की, ईमानवाले आणि काफिर दोन्ही तिला पाहून घेतील. ईमानवाले तिला पाहून अल्लाहचे आभार मानतील. की त्याने ईमान आणि सुकृत्यामुळे इच्यापासून वाचवून घेतले आणि काफिर जे पहिल्यापासूनच भीतीत आणि दहशतीत व्यस्त असतील, इला पाहून त्यांच्या दु:खांत आणि खेदांत आणखी वाढ होईल.

२) म्हणजे कुफ्र आणि गुन्ह्यांत मर्यादेच्या बाहेर गेले असतील.

३) म्हणजे इहलोकालाच सर्व काही समजले असेल आणि परलोकासाठी काही तयारी केली नसेल.

४) त्याच्या शिवाय त्याचे कोणतेही ठिकाण असणार नाही. जेथे तो इच्यापासून वांचून आश्रय घेऊन घेईल.

५) की जर मी गुन्हे आणि अल्लाहचे आज्ञाभंजन केले तर मला अल्लाहपासून वांचविणारा कोणी असणार नाही; म्हणून तो गुन्ह्यांपासून वांचत राहिला असेल.

६) म्हणजे स्वत:ला या गुन्ह्यांपासून आणि निषिद्ध गोष्टी करण्यापासून रोकत राहिला असेल, ज्यांच्याकडे मनोकामनेचा ओढा रहात होता.

७) जेथे तो मुक्काम करून राहिल; किंबहुना अल्लाहचा अतिथी होईल.

८) म्हणजे कयामत केव्हा घडून येईल आणि कायम होईल? त्याचप्रमाणे कयामत घडून येण्याचा बरोबर वेळ काय आहे?

९) म्हणजे आपणांस याच्या बाबतीत खात्रीलायक काहीच ज्ञान नाही. म्हणून आपला याचे वर्णन करण्याशी काय संबंध? याचे खात्रीशीर ज्ञान तर फक्त अल्लाहजवळच आहे.

१०) म्हणजे आपले काम फक्त भिवविणे आहे न की अदृष्टाच्या बातम्या देणे. ज्यांत कयामतचे पण ज्ञान आहे. जे अल्लाहने कोणाला पण दिले नाही. 'मय्-यख्शाहा' यासाठी म्हटले की, भिवविणे आणि प्रचारापासून, खरा फायदा तेच उचलतात, ज्यांच्या मनांत अल्लाहचे भय असते. नाहीतर भिवविण्याचा आणि प्रचाराचा हुकूम तर प्रत्येकासाठी आहे.

كَاَنَّهُمْ يَوْمَ يَرَوْنَهَا لَمْ يَلْبَثُوْٓا اِلَّا عَشِيَّةً اَوْ ضُحٰهَا ﴿٤٦﴾

ज्या दिवशी हे तिला पाहून घेतील, तर असे वाटेल की, फक्त एक सकाळ किंवा एक सांज (ते) जगांत राहिले आहेत. (१) ४६

سُوْرَةُ عَبَسَ مَكِّيَّةٌ (٨٠) (٢٤) اٰيَاتُهَا ٤٢ رُكُوْعُهَا ١

## (८०) सू. अबस

महावाक्ये ४२ | रुकूअ १

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

عَبَسَ وَتَوَلّٰٓى ﴿١﴾

त्याने कपाळास आढ्या घातल्या आणि तोंड फिरवून घेतले. १

اَنْ جَآءَهُ الْاَعْمٰى ﴿٢﴾

(फक्त यासाठी) की त्याच्याजवळ एक आंधळा आला. (२) २

وَمَا يُدْرِيْكَ لَعَلَّهٗ يَزَّكّٰٓى ﴿٣﴾

तू काय जाणतोस की, कदाचित् तो (सुधरुन) पवित्र होऊन (३) गेला असता. ३

اَوْ يَذَّكَّرُ فَتَنْفَعَهُ الذِّكْرٰى ﴿٤﴾

किंवा उपदेश ऐकतांआणि उपदेश त्याला फायदा पोहचविता. ४

اَمَّا مَنِ اسْتَغْنٰى ﴿٥﴾

(आणि) जो (कोणी) बेपर्वाई करतो. (४) ५

فَاَنْتَ لَهٗ تَصَدّٰى ﴿٦﴾

त्याच्याकडे तर तू फार लक्ष देतोस (५) ६

وَمَا عَلَيْكَ اَلَّا يَزَّكّٰى ﴿٧﴾

वास्तविक त्याच्या न सुधारण्याने तुझे काही नुकसान नाही. (६) ७

وَاَمَّا مَنْ جَآءَكَ يَسْعٰى ﴿٨﴾

आणि जो मनुष्य तुझ्याकडे धाव घेत येतो. (७) ८

وَهُوَ يَخْشٰى ﴿٩﴾

आणि तो भीत (ही) आहे. (८) ९

१) 'अशिय्यतन्' जुहर पासून सूर्यास्तापर्यंत आणि 'जुहा' सूर्योदयापासून अर्ध्या दिवसापर्यंत करीता बोलले जाते. म्हणजे जेव्हा काफिर नरकाग्नीची शिक्षा पाहतील, तर इहलोकातील ऐष आराम आणि त्याच्या मजा सर्व विसरून जातील; आणि त्यांना असे वाटेल की, ते जगांत संपूर्ण एक दिवस सुद्धा राहिले नाहीत. दिवसाचा पहिला हिस्सा म्हणजे सकाळ, किंवा शेवटचा हिस्सा, म्हणजे संध्याकाळ एवढेच जगांत राहिले. म्हणजे इहलौकीक आयुष्य त्यांना एवढे थोडेसे वाटेल.

✪ याच्या अवतरणाच्या कारणांमध्ये सर्व भाष्यकारांचे एकमत आहे. हे हजरत अब्दुल्लाह बिन उम्मे मकतुमच्या बाबतीत अवतरित झाले आहे. एकदा नबी करीम ﷺ च्या सेवेत काही कुरैशचे प्रतिष्ठीत लोक बसून गोष्टी करीत होते की, अचानक इब्ने उम्मे मकतुम, जे आंधळे होते, तेथे आले आणि नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला धर्माच्या गोष्टी विचारु लागले. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला यावर काही वाईट वाटले, आणि काही दुर्लक्ष केले. म्हणून तंबी म्हणून ही महावाक्ये अवतरीत झालीत. (तिर्मिझी तफसीर सू.अबस सहीहुल अल्बानी)

२) इब्ने उम्मे मकतुमच्या येण्याने नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या चेहऱ्यावर नाराजीची लक्षणे दिसू लागली. त्याला 'अबस' ने आणि दुर्लक्ष करण्याला 'तवल्ला' ने संबोधित केले.

३) म्हणजे तो आंधळा तुजजवळून धार्मिक मार्गदर्शन प्राप्त करून, सुकृत्ये करता ज्यामुळे त्याचे चारित्र्य आणि कर्तृत्व उजळून निघाले असते. त्याच्या अंतर्मनाची सुधारणा होऊन गेली असती. आणि तुझा उपदेश ऐकून त्याचा फायदा झाला असतां.

४) ईमानाने आणि त्या ज्ञानाने, जे तुझ्याकडे अल्लाहकडून आलेले आहे. किंवा दुसरे भाषांतर आहे, जो सुखसंपन्न आणि समाधानी आहे.

५) याच्यात आपण ﷺ ला आणखी लक्ष देण्यास सांगण्यात आले आहे की, जे प्रांजल आहेत, त्यांना सोडून आक्षेप घेणाऱ्यांकडे लक्ष देणे बरोबर गोष्ट नाही.

६) कारण की तुझे काम तर फक्त (आवाहन आणि) धर्मप्रचाराचे आहे. म्हणून अशा प्रकारच्या काफिरांच्या मागे लागण्याची आवश्यकता नाही.

७) या गोष्टीचा इच्छुक होऊन की, तू भलाईकडे त्याचे मार्गदर्शन करावे. आणि हितोपदेश करावा.

८) म्हणजे अल्लाहचे भय देखील त्याच्या मनात आहे. ज्यामुळे अशी अपेक्षा आहे की, तुझ्या गोष्टी त्याच्यासाठी फायदेकारक होतील आणि तो त्यावर अंमल करेल.

**तर याच्याने तू तोंड फिरवीत आहेस**[२] (१०) | فَاَنْتَ عَنْهُ تَلَهّٰى ۝١٠

**हे ठीक नाही.**[३] **कुरआन तर एक उपदेश आहे.** (११) | كَلَّآ اِنَّهَا تَذْكِرَةٌ ۝١١

**जो इच्छील त्याला आत्मसात करील.**[४] (१२) | فَمَنْ شَآءَ ذَكَرَهٗ ۝١٢

**(हे तर) महत्तापूर्ण पुस्तकांमधून (आहे)**[५] (१३) | فِيْ صُحُفٍ مُّكَرَّمَةٍ ۝١٣

**जे उच्चतम आणि पवित्र आहेत.**[६] (१४) | مَّرْفُوْعَةٍ مُّطَهَّرَةٍ ۝١٤

**अशा लिहिणाऱ्यांच्या हातांत आहेत.**[७] (१५) | بِاَيْدِيْ سَفَرَةٍ ۝١٥

**जे श्रेष्ठ आणि पुण्यशील आहेत.**[८] (१६) | كِرَامٍ بَرَرَةٍ ۝١٦

**(अल्लाहची) शिक्षा मनुष्यावर कसा कृतघ्न आहे.**[९] (१७) | قُتِلَ الْاِنْسَانُ مَآ اَكْفَرَهٗ ۝١٧

**त्याला अल्लाहने कोणत्या वस्तूने निर्माण केले.** (१८) | مِنْ اَيِّ شَيْءٍ خَلَقَهٗ ۝١٨

**एका थेंबापासून**[१०] **त्याला निर्माण केले मग अंदाजावर त्याला ठेवले.**[११] (१९) | مِنْ نُّطْفَةٍ ؕ خَلَقَهٗ فَقَدَّرَهٗ ۝١٩

**मग त्याच्यासाठी मार्ग सोपा केला**[१२] (२०) | ثُمَّ السَّبِيْلَ يَسَّرَهٗ ۝٢٠

२) म्हणजे अशा लोकांची कदर करण्याची आवश्यकता आहे. न की त्यांच्यापासून तोंड फिरवण्याची. ह्या महावाक्यांनी असे माहित झाले की, आवाहन व प्रचारामध्ये कोणाला विशेष केले नाही पाहिजे. तथापि ऐपतीप्रमाणे आणि गैर ऐपती प्रमाणे, श्रीमंत आणि गरीब, मालक आणि नोकर, पुरूष आणि स्त्री, लहान आणि मोठे सर्वांना समान प्रतिष्ठा देण्यात यावी. आणि सर्वांना एकसमान संबोधित केले जावे. अल्लाहतआला ज्याला इच्छील आपल्या परिपूर्ण प्रयुक्तीने उपदेशीत करील.

३) म्हणजे गरिबांपासून तोंड फिरविणे आणि श्रीमंतांकडे विशेष लक्ष हे बरोबर नाही. अर्थ आहे की, यापुढे असे परत केले जाऊ नये.

४) म्हणजे ज्याच्या मनात इच्छा जागेल तो यापासून उपदेश ग्रहण करेल, त्याला आत्मसात करेल आणि त्याच्यावर अंमल,करेल, आणि जो त्यापासून तोंड फिरवील जसे की, कुरैशच्या श्रीमंतांनी केले, तर त्यांची चिंता करण्याची आवश्यकता नाही.

५) म्हणजे 'लौहे महेफूज' मध्ये कारण की, तेथूनच हे कुरआन अवतरित होते. किंवा अर्थ आहे की ही पुस्तके अल्लाहजवळ फार आदरणीय आहेत. कारण की, ते ज्ञान आणि प्रयुक्त्यांनी पूर्ण आहे.

६) 'मरफूअतुन' म्हणजे अल्लाहजवळ श्रेष्ठ दर्जावाले आहे. किंवा शंका कुशंकेपासून आणि परस्पर विरोधापासून पवित्र आहे. कारण की त्यांना पवित्र लोका (देवदूतां) शिवाय कोणी स्पर्श करतच नाही. किंवा कमी-जास्तीपासून पवित्र आहे.

७) 'सफरतिन' ने अभिप्रेत येथे ते देवदूत आहेत जे अल्लाहची 'वह्य' त्याच्या पैगंबरांपर्यंत पोहचवतात. म्हणजे अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांच्या दरम्यान संदेशवाहकाचे काम करतात. हे कुरआन अशा दुतांच्या हातात आहे जे त्याला लौहे महेफ़ूज़ पासून अनुकरण करतात.

८) म्हणजे चारित्र्याच्या दृष्टीने तो सज्जन आणि थोर आहे. आणि कर्माच्या दृष्टीने तो पुण्यवान आणि पवित्र आहे. येथून ही गोष्ट माहित झाली की, कुरआन पाठांतर करणारा आणि कुरआनाचे ज्ञान बाळगणाऱ्याला सुद्धा चारित्र्य आणि व्यक्तिमत्व आणि कर्म व सवयींमध्ये त्यांच्या सारखाच असावयास पाहिजे.

९) याच्याने तो मनुष्य अभिप्रेत आहे की, जो कोणत्याही प्रमाणाशिवाय कयामतला खोटे ठरवतो. 'मा अकफरा' आश्चर्य म्हणून आहे. म्हणजे कशा प्रकारे कृतघ्न आहे. पुढे त्या मनुष्याला (कृतघ्नाला) चिंतन व मनन चे आवाहन केले जात आहे की, कदाचित त्याने आपल्या कुफ्रपासून परावृत्त व्हावे.

१०) म्हणजे ज्याचा जन्म अशा क्षुल्लक थेंबापासून (विर्य) झाला आहे, काय त्याला अहंकार व गर्व शोभतो?

११) याचा अर्थ आहे की, त्याला दोन हात, दोन पाय, दोन डोळे आणि इतर ज्ञानेंद्रिये दिली.

१२) म्हणजे भलाईचे व वाईटांचे मार्ग त्याच्यासाठी स्पष्ट करुन दिले. काही म्हणतात की, याच्याने अभिप्रेत आईच्या गर्भातून बाहेर निघण्याचा मार्ग आहे.

ثُمَّ اَمَاتَهٗ فَاَقْبَرَهٗ ۝٢١
मग त्याला मृत्यू दिला आणि कबरीमध्ये दफन केले.[१] २१

ثُمَّ اِذَا شَآءَ اَنْشَرَهٗ ۝٢٢
मग जेंव्हा इच्छील त्याला जिवंत करुन देईल. २२

كَلَّا لَمَّا يَقْضِ مَآ اَمَرَهٗ ۝٢٣
कदापि नाही,[२] त्याने आतापर्यंत अल्लाहच्या आदेशांवर अमलबजावणी केली नाही. २३

فَلْيَنْظُرِ الْاِنْسَانُ اِلٰى طَعَامِهٖٓ ۝٢٤
मनुष्याला पाहिजे की, आपल्या खाण्याकडे पहावे[३] २४

اَنَّا صَبَبْنَا الْمَآءَ صَبًّا ۝٢٥
की आम्ही खूप पाऊस वर्षविला. २५

ثُمَّ شَقَقْنَا الْاَرْضَ شَقًّا ۝٢٦
मग जमिनीला चांगल्या प्रकारे चिरले. २६

فَاَنْۢبَتْنَا فِيْهَا حَبًّا ۝٢٧
मग त्यातून धान्य उगविले २७

وَّعِنَبًا وَّقَضْبًا ۝٢٨
आणि द्राक्षे आणि पालेभाज्या २८

وَّزَيْتُوْنًا وَّنَخْلًا ۝٢٩
आणि ज़ैतून (ऑलिव्ह) आणि खारिक (खजूर) २९

وَّحَدَآئِقَ غُلْبًا ۝٣٠
आणि घनदाट बागा ३०

وَّفَاكِهَةً وَّاَبًّا ۝٣١
आणि फळे आणि (गवत) चारा (ही उगविला)[४] ३१

مَّتَاعًا لَّكُمْ وَلِاَنْعَامِكُمْ ۝٣٢
तुमच्या उपयोग आणि फायद्यासाठी आणि चतुष्पादांसाठी ३२

فَاِذَا جَآءَتِ الصَّآخَّةُ ۝٣٣
मग जेंव्हा कानांना बहिरे करणारी (कयामत) येऊन जाईल[५] ३३

يَوْمَ يَفِرُّ الْمَرْءُ مِنْ اَخِيْهِ ۝٣٤
त्यादिवशी मनुष्य आपल्या भावापासून पळेल. ३४

وَاُمِّهٖ وَاَبِيْهِ ۝٣٥
आणि आपली आई आणि आपल्या बापापासून ३५

وَصَاحِبَتِهٖ وَبَنِيْهِ ۝٣٦
आणि आपली पत्नी आणि आपल्या संततीपासून ३६

لِكُلِّ امْرِئٍ مِّنْهُمْ يَوْمَئِذٍ شَاْنٌ يُّغْنِيْهِ ۝٣٧
यांच्यातून प्रत्येकाला त्या दिवशी एक अशी फिकीर लागलेली असेल जी त्याला व्यस्त होण्याला पूरेशी होईल.[६] ३७

१) म्हणजे मृत्यूनंतर, त्याला कबरीत दफन करण्याचा हुकूम दिला. जेणेकरुन त्याचा आदर कायम रहावा नाहीतर पशु पक्षी त्याच्या शवास चिरुन फाडून खाऊन टाकते. ज्यामुळे त्याचा अनादर झाला असता.

२) म्हणजे मामला अशा प्रकारे नाही की, जसे हे काफिर म्हणत आहे.

३) की त्याला अल्लाहने कशा प्रकारे निर्माण केले जे त्याच्या जीवनाचे कारण आहे. आणि कशा प्रकारे त्याच्यासाठी खाण्यापिण्याचे (उदरनिर्वाहिचे) साधन सामग्री निर्माण केली जेणेकरुन तो त्यांच्या माध्यमातून परलोकाचे साफल्य प्राप्त करु शकेल.

४) 'अब्बन' म्हणजे ते गवत (चारा) जे आपोआप उगते आणि ज्यास जनावरे खातात.

५) कयामतला साख्ख: (बहिरा करुन देणारी) यासाठी म्हटले की, ती एक अतिश्य कडक आरोळीने घडून येईल. जी कानांना बहिरे करुन टाकेल.

६) किंवा आपले नातेवाईक आणि आपली माणसे यांचेपासून निरपेक्ष आणि बेपर्वा करून टाकील. हदीसमध्ये येते, नबी ﷺ नी फर्माविले, की सर्व लोक हशरच्या मैदानात नग्न शरीर असतील. अनवाणी पायी आणि खत्ना न झालेले, असतील. ह.आयेशा ؓ नी विचारले, अशाप्रकारे गुप्तेंद्रियावर दृष्टी पडणार नाही? आपण ﷺ नी याच्या उत्तरांत हेच महावाक्य पठण केले. (तिर्मिझी तफसीर सू.अबस,निसाई) याचे कारण काही जणांजवळ हे आहे की, मनुष्य आपल्या कुटुंबियाकडून,यासाठी पळ काढील की त्यांनी त्याचा तो त्रास आणि कठीणता पाहू नये, ज्यांत तो व्यस्त असेल. काही म्हणतात यासाठी त्यांना ठाऊक असेल की, ते कोणाला फायदा पोहचवू शकत नाही. आणि त्यांच्या काही कामा येऊ शकत नाही. (फत्हूल कदीर)

त्या दिवशी पुष्कळसे चेहरे चमकदार होतील. (३८) | وُجُوهٌ يَوْمَئِذٍ مُّسْفِرَةٌ ﴿٣٨﴾

(जे) हसरे आणि आनंदीत असतील.[१] (३९) | ضَاحِكَةٌ مُّسْتَبْشِرَةٌ ﴿٣٩﴾

आणि पुष्कळसे चेहरे त्या दिवशी असतील की त्यांच्यावर धूळ पडलेली असेल. (४०) | وَوُجُوهٌ يَوْمَئِذٍ عَلَيْهَا غَبَرَةٌ ﴿٤٠﴾

ज्यांच्यावर काळीमा पसरलेली असेल.[२] (४१) | تَرْهَقُهَا قَتَرَةٌ ﴿٤١﴾

हे तेच काफिर कुकृत्ये करणारे लोक असतील.[३] (४२) | أُولَٰئِكَ هُمُ الْكَفَرَةُ الْفَجَرَةُ ﴿٤٢﴾







जेव्हा सूर्य गुंढाळून घेण्यांत येईल.[४] (१) | إِذَا الشَّمْسُ كُوِّرَتْ ﴿١﴾

आणि जेव्हा तारे प्रकाशहीन होऊन जातील.[५] (२) | وَإِذَا النُّجُومُ انكَدَرَتْ ﴿٢﴾

आणि जेव्हा पर्वत चालविले जातील.[६] (३) | وَإِذَا الْجِبَالُ سُيِّرَتْ ﴿٣﴾

आणि जेव्हा दहा महिन्यांच्या गाभण उंटीणी मोकळ्या सोडून देण्यात येतील.[७] (४) | وَإِذَا الْعِشَارُ عُطِّلَتْ ﴿٤﴾

आणि जेव्हा रानटी जनावरे एकत्र गोळा केली जातील.[८] (५) | وَإِذَا الْوُحُوشُ حُشِرَتْ ﴿٥﴾

आणि जेव्हा समुद्र भडकाविले जातील.[९] (६) | وَإِذَا الْبِحَارُ سُجِّرَتْ ﴿٦﴾

१) हे ईमानवाल्यांचे चेहरे असतील. ज्यांना त्यांची कर्मपत्रे, त्यांच्या उजव्या हातात मिळतील. ज्यामुळे त्यांना पारलौकीक सद्भाग्याची आणि सफलतेची खात्री होऊन जाईल. ज्यामुळे त्यांचे चेहरे आनंदाने प्रफुल्लीत झालेले असतील.

२) म्हणजे फजिती आणि शिक्षा पाहून, त्यांचे चेहरे धूळ पडलेले, भयभीत आणि काळे ठिक्कर पडलेले असतील. जसा फारच दु:खी आणि उदास माणसाचा चेहरा असतो.

३) म्हणजे अल्लाहचा पैगंबराचा आणि कयामतचा इन्कार करणारे पण होते. आणि कुकृत्ये करणारे आणि कुचारित्र्याचे सुद्धा.

✪ या अध्यायामध्ये विशेष म्हणून कयामतचे चित्र रेखाटण्यांत आले आहे. म्हणूनच रसूलुल्लाह ﷺ चे फर्मान आहे, ''ज्याला ही गोष्ट पसंत आहे की, त्याने कयामतला अशाप्रकारे पहावे, जसे डोळ्यांनी पहाणे होत असते. तर त्याला पाहिजे की त्याने, सू.तकवीर, सू.इनफितार आणि सू.इनशेकाक (लक्षपूर्वक) वांचावे (तिर्मिझी, तफसीर सू.तकवीर, मुसनद अहमद)

४) म्हणजे ज्याप्रमाणे डोक्यावर फेटा गुंडाळला जातो. याप्रमाणे सूर्याच्या अस्तित्वाला गुंडाळून फेंकून देण्यात येईल. ज्यामुळे त्याचा प्रकाश स्वत:च आपोआप संपून जाईल. हदीसमध्ये आहे, ''कयामतच्या दिवशी चंद्र आणि सूर्य लपटून दिले जातील.'' (स.बुखारी) काही रिवायतींनी ठाऊक होते की, लपटून या उभयतांना नरकाग्नीमध्ये फेकून देण्यांत येईल. जेणे करून मुशरिक लोक आणखी फजित आणि अपमानित होऊन जावेत, जे त्यांची उपासना करीत असत. (फत्हूल बारी बाब मजकुर)

५) दुसरे भाषांतर आहे, झडून पडतील. म्हणजे आकाशांत त्याचे अस्तित्वच राहणार नाही.

६) म्हणजे त्यांना जमिनीतून उपटून, वाऱ्यांमध्ये चालवून दिले जाईल; आणि ते पिंजलेल्या कापसाप्रमाणे उघडतील.

७) 'इशारा' उशराअ' चे अनेकवचन आहे. गर्भवाल्या म्हणजे गाभण उंटीणी. गाभण उंटीणीचा गर्भ जेव्हा दहा महिन्याचा होऊन जातो, तेव्हा अरबांमध्ये त्या फार किंमती होऊन जात असत. जेव्हा कयामत घडून येईल, तर असे भयानक दृष्य असेल की, जर कोणाजवळ अशा बहूमुल्य उंटीणी पण असतील तरी, तो त्यांची पर्वा करणार नाही.

८) म्हणजे त्यांना पण कयामतच्या दिवशी गोळा केले जाईल.

९) म्हणजे त्यांच्यात अल्लाहच्या हुकूमाने आग भडकून उठेल.

وَإِذَا النُّفُوسُ زُوِّجَتْ ۝٧
आणि जेव्हा जीव (त्यांच्या आपसांत) मिळवून दिले जातील. (१) ७

وَإِذَا الْمَوْءُۥدَةُ سُئِلَتْ ۝٨
आणि जेव्हा जिवंत गाडून दिलेल्या मुलीला विचारले जाईल ८

بِأَيِّ ذَنۢبٍ قُتِلَتْ ۝٩
की, तुला कोणत्या अपराधामुळे ठार करण्यात आले? (२) ९

وَإِذَا الصُّحُفُ نُشِرَتْ ۝١٠
आणि जेव्हा कर्मपत्र उघडून दिले जातील. (३) १०

وَإِذَا السَّمَآءُ كُشِطَتْ ۝١١
आणि जेव्हा आकाशाचे कातडे काढले जाईल. (४) ११

وَإِذَا الْجَحِيمُ سُعِّرَتْ ۝١٢
आणि जेव्हा नरकाग्नी पेटविला जाईल. १२

وَإِذَا الْجَنَّةُ أُزْلِفَتْ ۝١٣
आणि जेव्हा स्वर्ग जवळ आणला जाईल. १३

عَلِمَتْ نَفْسٌ مَّآ أَحْضَرَتْ ۝١٤
तर त्या दिवशी प्रत्येक मनुष्य जाणून घेईल, जे काही तो घेऊन आला असेल. (५) १४

فَلَآ أُقْسِمُ بِالْخُنَّسِ ۝١٥
मी शपथ वहातो मागे हटणाऱ्या १५

الْجَوَارِ الْكُنَّسِ ۝١٦
चालण्या फिरणाऱ्या लपून जाणाऱ्या नक्षत्रांची (६) १६

وَالَّيْلِ إِذَا عَسْعَسَ ۝١٧
आणि रात्रीची जेव्हा की ती जाऊ लागेल. (७) १७

وَالصُّبْحِ إِذَا تَنَفَّسَ ۝١٨
आणि सकाळची जेव्हा की ती उजाडेल (८) १८

إِنَّهُۥ لَقَوْلُ رَسُولٍ كَرِيمٍ ۝١٩
खचित्‌च ही एका सन्माननीय दुताची (आणलेली) वाणी आहे. (९) १९

ذِى قُوَّةٍ عِندَ ذِى الْعَرْشِ مَكِينٍ ۝٢٠
जो शक्तीमान आहे, (१०) महासिंहासनाधीश अल्लाहच्या समीप ज्याचा मोठा दर्जा आहे. २०

مُّطَاعٍ ثَمَّ أَمِينٍ ۝٢١
ज्याचे (आकाशांमध्ये) आज्ञापालन केले जाते, प्रामाणिक आहे. (११) २१

وَمَا صَاحِبُكُم بِمَجْنُونٍ ۝٢٢
आणि तुमचा सोबती काही वेडा नाही. (१२) २२

وَلَقَدْ رَءَاهُ بِالْأُفُقِ الْمُبِينِ ۝٢٣
त्याने (देवदुताला) आकाशाच्या क्षितीजावर पाहिले सुद्धा आहे. (१३) २३

وَمَا هُوَ عَلَى الْغَيْبِ بِضَنِينٍ ۝٢٤
आणि तो गुप्त गोष्टी सांगण्यावर कंजुष देखील नाही . (१४) २४

وَمَا هُوَ بِقَوْلِ شَيْطَٰنٍ رَّجِيمٍ ۝٢٥
आणि हे कुरआन बहीष्कृत केलेल्या शैतानाची वाणी नाही. (१५) २५

فَأَيْنَ تَذْهَبُونَ ۝٢٦
मग तुम्ही कोठे चालले जात आहात? (१६) २६

إِنْ هُوَ إِلَّا ذِكْرٌ لِّلْعَٰلَمِينَ ۝٢٧
हे तर सकल जगाच्या लोकांसाठी उपदेशपत्र आहे. २७

لِمَن شَآءَ مِنكُمْ أَن يَسْتَقِيمَ ۝٢٨
(विशेषत:) त्याच्या करीता, जो तुमच्यातून सरळ मार्गाहून चालू इच्छित असेल. २८

وَمَا تَشَآءُونَ إِلَّآ أَن يَشَآءَ اللَّهُ رَبُّ الْعَٰلَمِينَ ۝٢٩
आणि तुम्ही सकल जगाच्या पालनकर्त्याने इच्छिल्याशिवाय, काही इच्छू शकत नाही. (१७) २९

१) याचे कित्येक भावार्थ सांगण्यात आले आहेत. जास्त बुद्धीला पटणारा हा वाटतो की, प्रत्येक माणसाला त्याच्या धर्म बांधवाशी आणि एकाच मसलकवाल्यांबरोबर मिळवून देण्यात येईल. ईमानवाल्यांना ईमानवाल्यांबरोबर, दुराचरणीला दुराचरण्यांबरोबर, यहूदीला यहूद्यांबरोबर खिस्त्याला खिस्त्यांबरोबर, व अला हाजल कयास.

२) अशाप्रकारे खुन्याची निर्भत्सना केली जाईल कारण की खरा अपराधी तर तोच असेल न की जिवंत गाडून

टाकलेली मुलगी, जिला उघड प्रश्न विचारण्यांत येईल.
३) मृत्यूच्या वेळी, ही लिहलेली पाने लपटून देण्यांत येतात. मग कयामतच्या दिवशी हिशेबासाठी उघडून देण्यांत येतील. ज्यांना प्रत्येक मनुष्य पाहून घेईल. किंबहूना हातात धरवून दिले जातील.
४) म्हणजे ते अशाप्रकारे उघडून दिले जातील, ज्याप्रमाणे छत उघडून दिले जाते.
५) हे उत्तर आहे. म्हणजे जेव्हा या चर्चित गोष्टी घडून येतील, ज्यांच्यातून पहिल्या सहा गोष्टींचा संबंध इहलोकाशी आहे, आणि दुसऱ्या सहा गोष्टींचा परलोकाशी त्यावेळी प्रत्येकासमोर इची वास्तविकता येऊन जाईल.
६) याच्याने अभिप्रेत नक्षत्रे आहेत. 'खुन्नस' 'खनस' पासून आहे. ज्याचा अर्थ मागे हटण्याचा आहे. ही नक्षत्रे दिवसा आपल्या दिसण्याने मागे हटून जातात. आणि दिसत नाही. आणि हे शनी,गुरु,मंगळ,शुक्र आणि बुध आहेत हे विशेष करून सूर्याच्याकडे असतात. काही म्हणतात ही सर्वच नक्षत्रे अभिप्रेत आहेत; कारण सर्वच आपल्या अदृष्ट होण्याच्या जागेवरून, अदृष्य होऊन जातात. किंवा दिवसाला लपून राहतात. 'अल्जवार' चालणारे. 'अल्कुन्नस' लपून जाणारे जसे हरण आपल्या घरांत किंवा राहण्याच्या जागेत लपून जाते.
७) म्हणजे येणे आणि जाणे, दोन्ही अर्थात याचा उपयोग होतो. तथापि येथे जाण्याच्या अर्थात आहे.
८) म्हणजे जेव्हा ती उजाडेल आणि सूर्योदय होऊन जाईल. किंवा ती फुटून आणि निघून येईल
९) यासाठी की तो त्याला अल्लाहकडून घेऊन आला आहे. अभिप्रेत ह.जिब्रईल عليه السلام आहेत.
१०) म्हणजे जे काम त्याच्या सुपूर्द करून देण्यांत येईल, त्याला पूर्ण शक्तीने करतो.
११) म्हणजे देवदूतांच्या दर्म्यान त्याचे आज्ञापालन केले जाते. तो देवदूतांचे आश्रयस्थान आहे. आणि सरदार आहे. तसेच वह्याच्या बाबतीत प्रामाणिक आहे.
१२) हे संबोधन मक्केवाल्यांना आहे. आणि साहिबने अभिप्रेत रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत. म्हणजे तुम्ही जी कल्पना करतात की, तुमच्याच वंशाचा आणि तुमच्याच मातृभूमीचा तुमचा सोबती (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) वेडा आहे. नाऊजु बिल्लाह् ! असे नाही ! जरा कुरआन वांचून तर पहा. की काय कोणी वेडा असे ज्ञानयुक्त आणि वास्तवतेला धरून वर्णन करूंशकतो. आणि मागील लोकांचे अगदी तंतोतंत खरे अहवाल सांगू शकतो जे या कुरआनांत सांगितले गेले आहे.
१३) हे पहिले येऊन चुकले आहे की, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी ह.जिब्रईल عليه السلام ला दोन वेळा त्यांच्या मूळ स्वरुपांत पाहिले आहे. ज्यांतून एकाचा येथे उल्लेख आहे. ही पैगंबरीच्या सुरवातची घटना आहे. यावेळी ह.जिब्रईल عليه السلام चे सहाशे पंख होते. ज्यांनी आकाशाच्या क्षितीजांना भरून दिले होते. दुसऱ्या वेळेस मेअराजच्या प्रसंगी पाहिले. जसा की, सू.नज्म मध्ये तपशील येऊन चुकला आहे.
१४) हा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमच्या बाबतीत खुलासा केला जात आहे की, आपल्यास ज्या गोष्टींची सूचना देण्यांत येत आहे. जे आदेश आणि कर्तव्ये (फर्ज) आपणांस सांगण्यांत येत आहेत, यांच्यातून कोणी गोष्ट आपण आपल्याजवळ राखून ठेवत नाही. किंबहुना पैगंबरीच्या कर्तृत्वाच्या जबाबदारीची जाणीव ठेऊन, प्रत्येक गोष्ट आणि प्रत्येक हुकूम लोकांपर्यंत पोहचवून देतात.
१५) ज्याप्रमाणे तांत्रिक मांत्रिक लोकांजवळ शैतान येतात. आणि आकाशाच्या काही चोरून लपून ऐकलेल्या अपूर्ण गोष्टी, त्यांना सांगतात. कुरआन असे नाही.
१६) म्हणजे का याच्यापासून तोंड फिरविता? आणि त्याचे आज्ञापालन करीत नाही?
१७) म्हणजे तुमची इच्छा, अल्लाहच्या इच्छेवर अवलंबून आहे. जोपर्यंत तुमच्या इच्छेबरोबर, अल्लाहची मर्जी आणि त्याने दिलेली सुबुद्धी, शामील होत नाही, तो पर्यंत तुम्ही सरळ मार्गपण अंगीकारू शकत नाही. हा तोच विषय आहे. जो, ''आपण ज्याला इच्छाल, त्याला हिदायत करू शकत नाही, परंतु अल्लाहतआलाच ज्याला इच्छील त्याला हिदायत करतो.'' (सू.कसस-५६) वगैरे महावाक्यांत वर्णन झाला आहे.

महावाक्ये १९ | (८२) सू. इनफितार | रुकूअ १

(٨٢) سُوْرَةُ الْاِنْفِطَارِ مَكِّيَّةٌ (٨٢) | اٰيَاتُهَا ١٩ | رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावानें मी आरंभ करतो

اِذَا السَّمَآءُ انْفَطَرَتْ ۝١

**जेव्हा आकाश फाटून जाईल.** [१] ①

وَاِذَا الْكَوَاكِبُ انْتَثَرَتْ ۝٢

**आणि जेव्हा तारे झडून जातील.** ②

وَاِذَا الْبِحَارُ فُجِّرَتْ ۝٣

**आणि जेव्हा समुद्र वाहविले जातील.** [२] ③

وَاِذَا الْقُبُوْرُ بُعْثِرَتْ ۝٤

**आणि जेव्हा कबरी दुभंगून उखडून टाकल्या जातील.** [३] ④

عَلِمَتْ نَفْسٌ مَّا قَدَّمَتْ وَاَخَّرَتْ ۝٥

**(यावेळी) प्रत्येक मनुष्य, आपण पुढे पाठविलेल्या आणि मागे सोडून दिलेल्यां (म्हणजे मागच्या पूढच्या कर्मां) ना ठाऊक करून घेईल** [४] ⑤

يٰۤاَيُّهَا الْاِنْسَانُ مَا غَرَّكَ بِرَبِّكَ الْكَرِيْمِ ۝٦

**हे मानवा! तुला आपल्या उदार पालनकर्त्याकडून कोणत्या गोष्टीने बहकविले?** [५] ⑥

الَّذِيْ خَلَقَكَ فَسَوّٰىكَ فَعَدَلَكَ ۝٧

**ज्या (पालनकर्त्याने) तुला निर्माण केले.** [६] **मग ठिकठाक केले.** [७] **मग (दुरुस्त आणि) बरोबर केले.** [८] ⑦

فِيْۤ اَيِّ صُوْرَةٍ مَّا شَآءَ رَكَّبَكَ ۝٨

**ज्या स्वरुपांत इच्छीले तुला ढाळले.** [९] ⑧

१) अल्लाहचा हुकूम आणि त्याच्या हैबतीने फाटून जाईल. आणि देवदूत खाली उतरून येतील.

२) आणि सर्वांचे पाणी एकाच समुद्रांत जमा होऊन जाईल मग अल्लाहतआला पश्चिमी वाऱ्याला पाठवील. जो याच्यांत आग भडकवून देईल, ज्यामुळे याच्यांत आकाशाला भिडणाऱ्या ज्वाला निर्माण होतील.

३) म्हणजे थडग्यांतून मृत जिवंत होऊन बाहेर निघून येतील. 'बुअ्सिरत्' उखडून दिली जातील. किंवा त्यांची माती उलटवून दिली जाईल.

४) म्हणजे जेव्हा चर्चित गोष्टी घडून येतील. तर मनुष्याला आपल्या सर्व केल्या सवरल्याचे ज्ञान होऊन जाईल. जे पण चांगले किंवा वाईट त्याने केले असेल, ते समोर येऊन जाईल. मागे सोडून दिलेल्या कर्मांनी अभिप्रेत, आपल्या मागे आपले कर्तृत्व आणि कर्माचे चांगले किंवा वाईट नमुने, आहेत, जे जगांत तो सोडून आला; आणि लोक त्या नमुन्यांवर कर्म करतात. हे नमुने जर चांगले आहेत, तर त्याच्या मेल्यानंतर, या नमुन्यांवर जे लोक पण कर्म करतील, त्याचे पुण्य त्याला पोहचत राहील. आणि जर वाईट नमुने आपल्यामागे सोडून गेला आहे तर जो जो पण त्यांचा अंगीकार करील, त्याला गुनाहपण त्याच मनुष्याला पोहचत राहील, ज्याच्या प्रयत्नाने ती वाईट पद्धत किंवा काम चालू झाले.

५) म्हणजे कोणत्या गोष्टीने तुला धोक्यात आणि फसवणुकीत टाकून दिले की तू या पालनकर्त्याशी कुफ्र केले. ज्याने तुझ्यावर उपकार केला. आणि अस्तित्व बहाल केले तुला अक्कल आणि समज दिली. आणि जीवनाची सामुग्री तुला प्राप्त करून दिली.

६) म्हणजे तुच्छ वीर्यबिंदूपासून जेव्हा की याच्यापूर्वी तुझे अस्तित्व नव्हते.

७) म्हणजे तुला एक परिपूर्ण मनुष्य बनवून दिले. तू ऐकतो, पाहतो. आणि अक्कल व समज बाळगतो.

८) तुला योग्य दर्जाचा, उभा आणि सुंदर चेहऱ्याचा बनविला.किंवा तुझे दोन्ही डोळे, दोन्ही कान दोन्ही हात, आणि दोन्ही पायांना समान बनविले. जर तुझ्या अवयवांमध्ये ही समानता नसती तर तुझ्या अस्तित्वांत सौंदर्याच्या ऐवजी, बेढबपणा झाला असता. याच निर्मितीला दुसऱ्या ठिकाणावर 'अह्सने तकवीम' ने संबोधित केले. ''लकद् खलकनल् इन्सान फी अह्सने तकवीम.'' निश्चितच आम्ही मनुष्याला उत्कृष्ट देहयष्टीने निर्माण केले. (सू. तीन-४)

९) याचा एक भावार्थ तर हा आहे की, अल्लाह मुलाला ज्याच्या सारखा इच्छितो त्याच्या सारखा करून देतो. बापाच्या आईच्या किंवा मामा आणि काकांच्या (सारखा). दुसरा अर्थ आहे की, तो ज्या रुपांत इच्छितो, ढाळून देतो. येथपावेतो की, तिरस्करणीय जनावराच्या चेहऱ्यांत सुद्धा पैदा करू शकतो. परंतु ही त्याची कृपा आणि दया आहे की, तो असे करीत नाही. आणि उत्कृष्ट मानवी चेहऱ्यांतच निर्माण करतो.

كَلَّا بَلْ تُكَذِّبُونَ بِالدِّينِ ۙ﴿٩﴾
नाही! नाही!! किंबहुना तुम्ही तर निर्णयाच्या दिवसाला खोटे ठरवतात.[१] ९

وَإِنَّ عَلَيْكُمْ لَحَافِظِينَ ۙ﴿١٠﴾
खचित्‌च तुमच्यावर (आमचे) सन्माननीय पहारेकरी १०

كِرَامًا كَاتِبِينَ ۙ﴿١١﴾
(म्हणजे) लिहीणारे तैनांत आहेत. ११

يَعْلَمُونَ مَا تَفْعَلُونَ ﴿١٢﴾
जे काही तुम्ही करतात, ते त्यांस माहित होते.[२] १२

إِنَّ الْأَبْرَارَ لَفِي نَعِيمٍ ۙ﴿١٣﴾
नि:संशय सदाचरणी लोक (स्वर्गाच्या ऐष आरामांत आणि) देणग्यांमध्ये असतील. १३

وَإِنَّ الْفُجَّارَ لَفِي جَحِيمٍ ۚ﴿١٤﴾
आणि खचित्‌च दुराचरणी लोक नरकाग्नीत असतील.[३] १४

يَصْلَوْنَهَا يَوْمَ الدِّينِ ﴿١٥﴾
निर्णयाच्या दिवशी त्यांत जातील.[४] १५

وَمَا هُمْ عَنْهَا بِغَائِبِينَ ۗ﴿١٦﴾
हे लोक याच्या कधी बाहेर निघणार नाही.[५] १६

وَمَا أَدْرَاكَ مَا يَوْمُ الدِّينِ ۙ﴿١٧﴾
तू काय समजलास की मोबदल्याचा दिवस काय आहे? १७

ثُمَّ مَا أَدْرَاكَ مَا يَوْمُ الدِّينِ ۗ﴿١٨﴾
मी (पून्हा विचारतो की), तुला काय ठाऊक की निर्णयाचा दिवस काय आहे[६] १८

يَوْمَ لَا تَمْلِكُ نَفْسٌ لِنَفْسٍ شَيْئًا ۖ وَالْأَمْرُ يَوْمَئِذٍ لِلَّهِ ﴿١٩﴾
(तो आहे) ज्या दिवशी कोणी मनुष्य कोण्या मनुष्यासाठी काहीही सत्ता बाळगणार नाही. आणि (सर्वच्या सर्व) अधिकार त्या दिवशी अल्लाहचेच असतील.[७] १९

१) 'कल्ला' 'हक्का' च्या अर्थात पण होऊ शकतो. आणि काफिरांच्या या रवैय्याचे खंडन सुद्धा, जे मेहेरबान अल्लाहच्या मेहेरबानी आणि दयेने, धोक्यांत व्यस्त होण्यावर अवलंबून आहे. म्हणजे या मनोकामनेच्या धोक्यांत व्यस्त होण्याचे काही कारण नाही; किंबहुना खरी गोष्ट ही आहे की, तुमच्या मनांत या गोष्टीची खात्री नाही. की कयामत होईल, आणि तेथे न्यायनिवाडा (म्हणजे निर्णय) होईल.

२) म्हणजे तुम्ही तर निर्णयाच्या दिवसांचे नाकारणारे आहांत. परंतु तुम्हास ठाऊक असावयास पाहिजे तुमचे कथन आणि प्रत्येक कर्म, लिहिले जात आहे. अल्लाहकडून देवदूत तुमच्यावर पहारेकरी म्हणून तैनात केलेले आहेत. ते तुमच्या प्रत्येक त्या गोष्टीला जाणतात, जी तुम्ही करतात की जणू मनुष्यांना तंबी आहे की, प्रत्येक कर्म आणि गोष्टींवर ती करण्यापूर्वी विचार करून घ्या. की, कोठे ते चुकीचे तर नाही. ही तीच गोष्ट आहे जी पूर्वी येऊन चुकली आहे., ''म्हणजे एक देवदूत त्याच्या उजवीकडे आणि दुसरा त्याच्या डावीकडे बसलेला आहे. मनुष्य जे बोलतो, त्याच्याजवळ एक पहारेकरी, तयार आणि हजर आहे.'' (सू.काफ-१७-१८) म्हणजे लिहीण्याकरीता, असे म्हणतात की, एक देवदूत पुण्य आणि दुसरा पाप लिहितो. आणि हदीशी आणि आसार (सहाबांचे कौल) ने ठाऊक होते की, दिवसाचे दोन देवदूत वेगळे आणि रात्रीचे दोन वेगळे असतात. पुढे पुण्यवान आणि पापी दोघांचा उल्लेख करण्यांत येत आहे.

३) म्हणजे दुसऱ्या ठिकाणी फर्माविले, ''एक गट स्वर्गात आणि एक गट नर्कात'' (सू.शूरा-७)

४) त्या दिवशी आपल्या कर्मांच्या दुष्परिणामांत नर्काग्नीत दाखल होतील.

५) म्हणजे कधी इच्यापासून वेगळे होणार नाही. आणि तिच्यापासून गैरहजर राहणार नाही. किंबहुना नित्य निरंतर तिच्यांतच राहतील.

६) वारंवार सांगणे, तिची महानता, महत्त्व आणि त्या दिवसाच्या भयानकतेच्या खुलाशाकरीता आहे.

७) म्हणजे इहलोकांत तर अल्लाहने तात्पुरत्या स्वरुपांत, परीक्षा घेण्याकरीतां, मनुष्यांना कमी जास्तच्या काही फरकाने, अधिकार देऊन ठेवले आहे. परंतु कयामतच्या दिवशी मात्र सर्व अधिकार संपूर्णपणे फक्त आणि फक्त, अल्लाहकडेच असतील. जसे फर्माविले, ''आज कोणाचे राज्य आहे? फक्त एका जबरदस्त अल्लाहचे.'' (सू.मोमीन-१६) म्हणून नबी ﷺ नी आपली आत्या ह.सफिया رضي الله عنها आणि मुलगी ह.फातिमा رضي الله عنها ला सांगून टाकले होते, तुमच्यासाठी मी अल्लाहजवळ काही कामा येणार नाही (स.मुस्लिम, किताबुल ईमान) आणि बनी हाशम व बनी अब्दुल् मुत्तलिब ला पण ताकीद केली, ''आपल्या स्वत:स नरकाग्निच्यापासून वाचवा. अल्लाहची शपथ मी अल्लाहजवळ तुमच्यासाठी काही कामा येणार नाही.'' (स. मुस्लिम, स. बुखारी)

## (८३) सू. मुतफ्फिफीन

महावाक्ये ३६ | रुकूअ १

ايَاتُهَا ٣٦ (٨٣) سُوْرَةُ الْمُطَفِّفِيْنَ مَكِّيَّةٌ (٨٦) رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

وَيْلٌ لِّلْمُطَفِّفِيْنَ ۙ﴿١﴾

**मापातोलांत कमी देणाऱ्यांसाठी फारच बर्बादी आहे.** (१)

الَّذِيْنَ اِذَا اكْتَالُوْا عَلَى النَّاسِ يَسْتَوْفُوْنَ ۖ﴿٢﴾

**की जेव्हा लोकांकडून मापून घेतात, तेव्हा पुरे पुरे घेतात.** (२)

وَاِذَا كَالُوْهُمْ اَوْ وَّزَنُوْهُمْ يُخْسِرُوْنَ ؕ﴿٣﴾

**आणि मग जेव्हा त्यांना मापून किंवा तोलून देतात, तेव्हा कमी देतात**[१] (३)

اَلَا يَظُنُّ اُولٰٓئِكَ اَنَّهُمْ مَّبْعُوْثُوْنَ ۙ﴿٤﴾

**काय त्यांना आपल्या मेल्यानंतर जिवंत होऊन उठण्याची खात्री नाही?** (४)

لِيَوْمٍ عَظِيْمٍ ۙ﴿٥﴾

**त्या महान दिवशी** (५)

يَّوْمَ يَقُوْمُ النَّاسُ لِرَبِّ الْعٰلَمِيْنَ ؕ﴿٦﴾

**ज्या दिवशी सर्व लोक सकल जगाच्या पालनकर्त्यासमोर उभे राहतील.**[२] (६)

كَلَّآ اِنَّ كِتٰبَ الْفُجَّارِ لَفِيْ سِجِّيْنٍ ؕ﴿٧﴾

**खचित्च दुराचरणी लोकांचे कर्मपत्र 'सिज्जीन' मध्ये आहे.**[३] (७)

وَمَآ اَدْرٰىكَ مَا سِجِّيْنٌ ؕ﴿٨﴾

**तुला काय माहित, 'सिज्जीन' काय आहे?** (८)

كِتٰبٌ مَّرْقُوْمٌ ؕ﴿٩﴾

**(हे तर) लिहिलेले पुस्तक आहे.** (९)

وَيْلٌ يَّوْمَئِذٍ لِّلْمُكَذِّبِيْنَ ۙ﴿١٠﴾

**त्या दिवशी खोटे ठरवणाऱ्यास फारच दु:ख आहे.** (१०)

الَّذِيْنَ يُكَذِّبُوْنَ بِيَوْمِ الدِّيْنِ ؕ﴿١١﴾

**जे निर्णयाच्या दिवसाला खोटे ठरवत राहिले.** (११)

✪ काही या अध्यायाला मक्की आणि काही मदनी ठरवितात. काहींच्या जवळ हा अध्याय मक्का आणि मदीनेच्या दर्म्यान अवतीर्ण झाला. याच्या अवतरणाच्या कारणांत ही रिवायत आहे की, जेव्हा नबी ﷺ मदीनेत आलेत, त्यावेळी मदीनेचे लोक मापातोलाच्या मामल्यांत फारच वाईट लोक होते. म्हणून अल्लाहतआलाने हा अध्याय अवतीर्ण केला. ज्यानंतर त्यांनी आपले माप तोल बरोबर करून घेतले. (इब्ने माजा.)

१) म्हणजे घेण्या आणि देण्याचे अलग अलग माप ठेवणे, आणि अशाच प्रकारे दांडी मारून मापातोलांत कमी करणे, हा फारमोठा चारित्र्य विषयक रोग आहे. ज्याचा परिणाम धर्मांत आणि परलोकांत बर्बादी आहे. एका हदीसमध्ये आहे, जो समाज मापातोलात कमी करतो, तर त्याच्यावर दुष्काळ, फारच परिश्रम, आणि सत्ताधाऱ्यांचा जुलूम, लादून देण्यांत येतो. (इब्ने माजा, क्र.४०१९)

२) हे दांडी मारणारे या गोष्टीपासून भित नाही की, एक फार मोठा भयानक दिवस येणार आहे, ज्यांत सर्व लोक सकल जगाच्या पालनकर्त्यासमोर उभे राहणार आहेत, जो सर्व गुप्त गोष्टींना जाणतो? अर्थ हा आहे की, हे काम तेच लोक करतात ज्यांच्या मनांत अल्लाहचे भय आणि कयामतची भीती नाही. हदीसींमध्ये येते की, ज्यावेळी सकल जगाच्या पालनकर्त्याकरीता उभे राहतील, तेव्हा घाम माणसांच्या कानांपर्यंत पोहचेल. (स.बुखारी तफसीर सू.मुतफ्फिफीन) एका आणखी रिवायतीमध्ये आहे की, कयामतच्या दिवशी सूर्य लोकांच्या इतक्या जवळ असेल की, एका मैलाएवढे अंतर असेल. (हदीसचे रावी ह.सुलैम बिन आमिर म्हणतात की मला ठाऊक नाही की नबी ﷺ नी मैलाने जमिनीवरील प्रवासाचा मैल अभिप्रेत धरला आहे, किंवा ती सळी, जिच्याने सुरमा डोळ्यांत घालतात.) तर लोक आपल्या कर्मांप्रमाणे घामांत बुडालेले असतील. हा घाम कोणाच्या घोट्यापर्यंत, कोणाच्या गुडघ्यापर्यंत, कोणाच्या कमरेपर्यंत, असेल आणि कोणाकरीता लगाम बनून जाईल. म्हणजे त्याच्या तोंडापर्यंत हा घाम राहील. (स.मुस्लिम)

३) 'सिज्जीन' काही म्हणतात सिज्जीन तुरूंगा पासून आहे. अर्थ आहे की, तुरुंगाप्रमाणे एक फारच अडचणीची जागा आहे. आणि काही म्हणतात की, पृथ्वीच्या सर्वांत खालच्या भागांत एक जागा आहे, जेथे काफिरांचे, अत्याचारी लोकांचे आणि मुशरिक लोकांचे आत्मे आणि त्यांची कर्मपत्रे, एकत्र गोळा आणि सुरक्षित होतात. म्हणून पुढे त्याला ''लिहिलेले पुस्तक'' ठरविले आहे.

وَمَا يُكَذِّبُ بِهِ إِلَّا كُلُّ مُعْتَدٍ أَثِيمٍ ﴿١٢﴾

**त्याला फक्त तोच खोटे ठरवतो, जो मर्यादेच्या बाहेर निघून जाणारा (आणि) गुन्हेगार असतो. (१२)**

إِذَا تُتْلَىٰ عَلَيْهِ آيَاتُنَا قَالَ أَسَاطِيرُ الْأَوَّلِينَ ﴿١٣﴾

**जेव्हा त्याच्यासमोर आमची महावाक्ये वांचली जातात; तेव्हा सांगून टाकतो की, या तर पूर्वीच्या लोकांच्या भाकड कथा आहेत. (१) (१३)**

كَلَّا ۖ بَلْ ۜ رَانَ عَلَىٰ قُلُوبِهِمْ مَا كَانُوا يَكْسِبُونَ ﴿١٤﴾

**कदापि (२) नाही, किंबहुना त्यांच्या अंत:करणांवर, त्यांच्या कर्मांमुळे, जंग (चढून गेला) आहे. (३) (१४)**

كَلَّا إِنَّهُمْ عَنْ رَبِّهِمْ يَوْمَئِذٍ لَمَحْجُوبُونَ ﴿١٥﴾

**कदापि नाही, हे लोक त्या दिवशी, अल्लाहच्या दर्शनापासून वंचित् राहतील. (४) (१५)**

ثُمَّ إِنَّهُمْ لَصَالُو الْجَحِيمِ ﴿١٦﴾

**मग हे लोक खचित्च नरकाग्नीमध्ये झोकून दिले जातील. (१६)**

ثُمَّ يُقَالُ هَٰذَا الَّذِي كُنْتُمْ بِهِ تُكَذِّبُونَ ﴿١٧﴾

**मग सांगून देण्यांत येईल की, हाच तर आहे तो, ज्याला तुम्ही खोटे ठरवत राहिला. (१७)**

كَلَّا إِنَّ كِتَابَ الْأَبْرَارِ لَفِي عِلِّيِّينَ ﴿١٨﴾

**खचित्च खचित्!! सदाचरणी लोकांचे कर्मपत्र 'इल्ली यीन' मध्ये आहे. (५) (१८)**

وَمَا أَدْرَاكَ مَا عِلِّيُّونَ ﴿١٩﴾

**आणि तुला काय माहित, 'इल्लीयीन' काय आहे? (१९)**

كِتَابٌ مَرْقُومٌ ﴿٢٠﴾

**(ते तर) लिहिलेले एक पुस्तक आहे. (२०)**

يَشْهَدُهُ الْمُقَرَّبُونَ ﴿٢١﴾

**त्याच्याजवळ सानिध्य प्राप्त देवदूत हजर असतात. (२१)**

إِنَّ الْأَبْرَارَ لَفِي نَعِيمٍ ﴿٢٢﴾

**नि:संशय सदाचरणी लोक (मोठ्या) सुखांत (नईम) असतील. (२२)**

عَلَى الْأَرَائِكِ يَنْظُرُونَ ﴿٢٣﴾

**(ते) तक्त्यावर बसून (स्वर्गाची मौज) पहात असतील. (२३)**

تَعْرِفُ فِي وُجُوهِهِمْ نَضْرَةَ النَّعِيمِ ﴿٢٤﴾

**तू त्यांच्या चेहऱ्यावरूनच सुखाचा टवटवीतपणा ओळखून घेशील. (६) (२४)**

१) म्हणजे त्याचे पापांत लिप्त होणे, आणि मर्यादेबाहेर इतके गेले आहे की अल्लाहची महावाक्ये ऐकून त्यांच्यावर चिंतन आणि मनन करण्याऐवजी त्यांना मागील लोकांच्या कथा म्हणतो.

२) म्हणजे हे कुरआन कथा नाहीत. जसे की, काफिर म्हणतात आणि समजतात. किंबहुना ही अल्लाहची वाणी आहे. आणि त्याचे 'वह्य' आहे. जे त्याच्या पैगंबरांवर प्रामाणिक ह.जिब्रईल عليه السلام मार्फत अवतरीत झाली आहे.

३) म्हणजे त्यांची अंत:करणे कुरआन आणि अल्लाहच्या वह्यावर ईमान यासाठी आणित नाहीत की त्याच्या अंत:करणावर भरपूर पातके केल्यामुळे पडदे पडून गेले आहेत. आणि ते जंगयुक्त होऊन गेले आहेत. 'रैन' पातकांचा तो काळेपणा आहे, जो सतत पातके करीत राहिल्याने, त्यांच्या अंत:करणावर आच्छादून जातो. हदीसमध्ये आहे, मनुष्य जेव्हा पाप करीतो तर त्याच्या अंत:करणावर एक काळा डाग पडून जातो. जर तो तौबा करून घेतो. तर तो काळेपणा दूर करून देण्यात येतो. आणि जर तौबाच्या ऐवजी पापावर पापे करीत जातो, तर तो काळेपणा वाढत जातो. येथ पावेतो की, त्याच्या पूर्ण अंत:करणावर आच्छादून जातो. हेच ते 'रैन' आहे ज्याचा उल्लेख कुरआन मजीद मध्ये आहे. (तिर्मिझी इब्ने माजा मुसनद अहमद २१७/२)

४) यांच्या उलट ईमानवाले अल्लाहच्या दर्शनाने पावन होतील.

५) 'इल्लीयीन' 'उलुव्व' (उंची) पासून आहे. ही 'सिज्जीन' च्या उलट, आकाशांत, किंवा स्वर्गांत, किंवा 'सिद्रतल मुन्तहा', किंवा अल्लाहच्या महासिंहासनाजवळ, एक जागा आहे; जेथे सदाचरणी लोकांचे आत्मे आणि त्यांची कर्मपत्रे सुरक्षित केले जातात. ज्याच्या जवळ सामिप्य प्राप्त देवदूत हजर असतात.

६) ज्याप्रमाणे जगांत सुखसंपन्न लोकांच्या चेहेऱ्यावर सर्वसाधारणपणे टवटवीतपणा आणि प्रफुल्लीतपणा असतो. जो सुखी जीवनाचा आणि सवलतींचा दर्शक असतो. ज्या त्यांना विपुलतेने मिळतात. अशाच प्रकारे स्वर्गवासियांवर जो मानसन्मान आणि आनंदाचा भडीमार होईल, त्याचे परिणाम, त्यांच्या चेहेऱ्यावर पण जाहीर होतील. ते आपल्या रुपसौंदर्य, टवटवीतपणा आणि प्रफुल्लतेने ओळखून घेतले जातील की ते स्वर्गवासी आहेत.

يُسْقَوْنَ مِن رَّحِيقٍ مَّخْتُومٍ ﴿٢٥﴾
**त्यांना मोहोरबंद शुद्ध मद्य पाजले जाईल.** [१] ㉕

خِتَامُهُ مِسْكٌ ۚ وَفِي ذَٰلِكَ فَلْيَتَنَافَسِ الْمُتَنَافِسُونَ ﴿٢٦﴾
**ज्याच्यावर कस्तुरीची मोहोर असेल; ईर्षा बाळगणाऱ्यांना पाहिजे की, त्यांनी याचीच ईर्षा बाळगावी.** [२] ㉖

وَمِزَاجُهُ مِن تَسْنِيمٍ ﴿٢٧﴾
**आणि त्याच्यात 'तस्नीम' चे मिश्रण असेल.** [३] ㉗

عَيْنًا يَشْرَبُ بِهَا الْمُقَرَّبُونَ ﴿٢٨﴾
**तो झरा ज्याचे पाणी सानिध्य प्राप्त लोक पितील.** ㉘

إِنَّ الَّذِينَ أَجْرَمُوا كَانُوا مِنَ الَّذِينَ آمَنُوا يَضْحَكُونَ ﴿٢٩﴾
**पापी लोक ईमानवाल्यांची हंशी उडवित असत.** [४] ㉙

وَإِذَا مَرُّوا بِهِمْ يَتَغَامَزُونَ ﴿٣٠﴾
**आणि त्यांच्या जवळून जातांना डोळे मिचकवून आपसांत इशारा करत असत.** [५] ㉚

وَإِذَا انقَلَبُوا إِلَىٰ أَهْلِهِمُ انقَلَبُوا فَكِهِينَ ﴿٣١﴾
**आणि जेव्हा आपल्या लोकांकडे परतून जात, तेव्हा टवाळ्या करत असत.** [६] ㉛

وَإِذَا رَأَوْهُمْ قَالُوا إِنَّ هَٰؤُلَاءِ لَضَالُّونَ ﴿٣٢﴾
**आणि जेव्हा त्यांना पहात, तेव्हा म्हणत, खचित्‌च हे लोक बहकलेले, मार्ग भटकलेले आहेत.** [७] ㉜

१) 'रहीक' स्वच्छ, स्फटिकासारखे आणि शुद्ध मद्याला म्हणतात. जिच्यांत कुठल्याही वस्तूचे मिश्रण नसावे. 'मखतुम' (मोहोरबंद) याच्या शुद्धतेचा आणखी खुलाश्याकरीता आहे. काहींच्याजवळ हे मिश्रीतच्या अर्थांत आहे. म्हणजे मद्यामध्ये कस्तुरीचे मिश्रण असेल. ज्यामुळे तिची चव दुप्पट आणि सुगंध आणखी आनंदीत करणारा, पिण्यास उत्तम असा होऊन जाईल. काही म्हणतात हे 'खत्म' पासून आहे. म्हणजे याचा शेवटचा घोट कस्तुरीचा असेल. काही 'खिताम' चा अर्थ सुगंध असा करतात. असे मद्य ज्याचा सुगंध कस्तुरी सारखा असेल. (इब्ने कसीर) हदीसमध्ये सुद्धा हा शब्द आलेला आहे. नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी फर्मावले, ''ज्या ईमानवाल्याने कोण्या तहानलेल्या ईमानवाल्याला एक घोट पाणी पाजले, अल्लाहतआला त्याला कयामतच्या दिवशी 'अल् रहीकुल मखतुम' पाजील. ज्याने कोण्या उपाशी ईमानवाल्याला खाऊं घातले, अल्लाहतआला त्याला स्वर्गातील फळे खाऊं घालील. ज्याने कोण्या नग्न ईमानवाल्याला पोषाख घातला. अल्लाहतआला त्याला स्वर्गातील हिरव्या रंगाचा पोषाख घालील. (मुसनद अहमद)

२) म्हणजे कर्म करणाऱ्यांनी अशा कर्मांत सरशी घेतली पाहिजे, ज्याच्या बदल्यांत स्वर्ग आणि त्याच्या देणग्या प्राप्त व्हाव्यात. जसे फर्माविले, ''त्या सारख्यावस्तू करीतांच कर्म करणाऱ्यांना कर्म करावयास पाहिजे.'' (सू. साफ्फात-६१)

३) 'तसनीम' चा अर्थ उंचीचा आहे. उंटाची मदार, जी याच्या शरीरापेक्षा उंच असते त्याला 'सिनाम' म्हणतात. कबरीला उंच करण्याला सुद्धा 'तसनीमल कुबुर' म्हटले जाते. अर्थ आहे की याच्यांत तसनीम मद्याचे मिश्रण असेल, जी स्वर्गाच्या उंच इलाख्यांतून, एका झऱ्यामार्फत येईल. हे स्वर्गाचे उत्कृष्ट आणि उच्च मद्य असेल.

४) म्हणजे त्यांना क्षुल्लक समजून त्यांचा उपहास करतात आणि हंशी उडवित असत.

५) 'गमजुन' चा अर्थ आहे, पापण्या आणि भुवया यांच्याने इशारा करणे म्हणजे एक दुसऱ्याला आपल्या पापण्या व भुवयांनी इशारा करून त्यांना क्षुल्लक लेखतात, आणि त्यांच्या धर्माची टिंगल करतात.

६) म्हणजे ईमानवाल्यांचा उल्लेख करून, उत्तेजीत होतात; आणि टिंगल करतात. दुसरा अर्थ याचा हा आहे की, जेव्हा आपल्या घरी परत जातात तेव्हा तेथे संपन्नता आणि आराम त्यांचे स्वागत करतात. आणि जे इच्छितात ते त्यांना मिळून जाते. असे असून सुद्धा त्यांनी अल्लाहचे आभार मानले नाहीत. किंबहुना ईमानवाल्यांना क्षुल्लक लेखणे आणि त्यांना द्वेष करण्यांतच दंग राहिलेत (इब्ने कसीर)

७) म्हणजे एकेश्वरवादी शिर्कवाल्यांच्या दृष्टीने, आणि ईमानवाले, कुफ्रवाल्यांच्या समिप, आडमार्गी भटकलेले असतात. ही परिस्थिती आज सुद्धा आहे. आडमार्गी भटकणारे आपल्याला सत्यवादी आणि सत्यवादींना आडमार्गी भटकणारे ठरवितात. येथपावेतो की एक निव्वळ निरर्थक पंथ, आपल्याशिवाय कोणाला ईमानवाला म्हणत नाही आणि समजत नाही.

وَّمَآ اُرۡسِلُوۡا عَلَيۡهِمۡ حٰفِظِيۡنَ ؕ﴿۳۳﴾
हे त्यांच्यावर रक्षक बनवून तर पाठविले गेले नाहीत.[१] ३३

فَالۡيَوۡمَ الَّذِيۡنَ اٰمَنُوۡا مِنَ الۡكُفَّارِ يَضۡحَكُوۡنَ ۙ﴿۳۴﴾
तर आज ईमानवाले या काफिरांवर हंसतील.[२] ३४

عَلَى الۡاَرَآئِكِ ۙ يَنۡظُرُوۡنَ ؕ﴿۳۵﴾
तख्तावर बसून पहात असतील. ३५

هَلۡ ثُوِّبَ الۡكُفَّارُ مَا كَانُوۡا يَفۡعَلُوۡنَ ﴿۳۶﴾
की आता या नाकारणाऱ्यांनी, जसे हे करीत होते, (त्याचा) पूरा पूरा मोबदला मिळवून घेतला.[३] ३६

(٨٣) سُوۡرَةُ الۡاِنۡشِقَاقِ مَكِّيَّةٌ (٨٣) — اٰيَاتُهَا ٢٥ — رُكُوۡعُهَا ١

## (८४) सू. इनशिकाक

महावाक्ये २५ — रुकूअ १

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِذَا السَّمَآءُ انۡشَقَّتۡ ۙ﴿۱﴾
जेव्हा आकाश फाटून जाईल.[४] १

وَاَذِنَتۡ لِرَبِّهَا وَحُقَّتۡ ۙ﴿۲﴾
आणि आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेची प्रतीक्षा करील.[५] आणि ते याच लायकीचे आहे.[६] २

وَاِذَا الۡاَرۡضُ مُدَّتۡ ؕ﴿۳﴾
आणि जेव्हा जमीन (ताणून) पसरवून दिली जाईल.[७] ३

وَاَلۡقَتۡ مَا فِيۡهَا وَتَخَلَّتۡ ۙ﴿۴﴾
आणि तिच्यांत जे काही आहे, त्याला ती बाहेर टाकून देईल, आणि रिकामी होऊन जाईल.[८] ४

وَاَذِنَتۡ لِرَبِّهَا وَحُقَّتۡ ؕ﴿۵﴾
आणि आपल्या पालनकर्त्याच्या हुकूमावर लक्ष[९] देईल आणि ती याच्याच लायक आहे. ५

१) म्हणजे हे काफिर मुसलमानांवर पहारेकरी बनवून तर पाठविले गेले नाहीत. की नेहमी त्यांनी मुसलमानांची कर्मे आणि अहवालच पहात बसावे; आणि त्यांच्यावर टिका टिपणीच करीत रहावे. म्हणजे जेव्हा हे याला जबाबदार नाही, तर मग का ते असे करतात?

२) म्हणजे जगांत ज्याप्रमाणे काफिर, ईमानवाल्यांवर हंसत होते. कयामतच्या दिवशी हे काफिर अल्लाहच्या पकडीत असतील, आणि ईमानवाले त्यांच्यावर हंसत असतील. यांना हंसणे या गोष्टीवर येईल की हे बहकलेले असून सुद्धा आम्हास बहकलेले म्हणत असत आणि आम्हावर हंसत असत. आज त्यांना ठाऊक होऊन गेले की, बहकलेला कोण होता? आणि कोण याच्या लायक होता की, त्याची थट्टा मस्करी केली जावी?

३) 'सुव्विब' 'अुसीब' च्या अर्थात, मोबदला देऊन दिले गेले, म्हणजे काय काफिरांना जे काही ते करीत असत, त्याचा मोबदला दिला गेला आहे?

४) म्हणजे जेव्हा कयामत घडून येईल.

५) म्हणजे अल्लाह त्याला फाटण्याचा जो हुकूम देईल, त्याला ऐकेल आणि त्याचे आज्ञापालन करील.

६) म्हणजे त्याला हेच लायक आहे की त्याने ऐकावे आणि आज्ञापालन करावे. यासाठी की तो सर्वांवर प्रबळ आहे, आणि सर्व त्याच्या अधिन आहे. त्याच्या हुकूमापासून शिरजोरी करण्याची कोणाला हिंमत होऊ शकते ?

७) म्हणजे तिच्या लांबी रूंदीत आणखी वाढ करून दिली जाईल. किंवा अर्थ आहे की, इच्यावर जे पर्वत वगैरे आहेत, सर्वांना चूर्ण विचूर्ण करून, जमिनीला स्वच्छ किंवा सपाट करून आंथरुण दिले जाईल. तिच्यांत काही उंच, सखल राहणार नाही.

८) म्हणजे इच्यात जे मृत दफन झालेले आहेत, सर्व जिवंत होऊन बाहेर निघून येतील. जे खजिने इच्या पोटांत आहे. ती त्यांना उघड करून टाकील. आणि स्वत: एकदम रिक्त होऊन जाईल.

९) म्हणजे उगळून टाकण्याचा आणि खाली होण्याचा जो हुकूम तिला दिला जाईल, ती त्याप्रमाणे अंमलबजावणी करील.

يٰۤاَيُّهَا الْاِنْسَانُ اِنَّكَ كَادِحٌ اِلٰى رَبِّكَ كَدْحًا فَمُلٰقِيْهِ ۚ﴿٦﴾
हे मानवा! तूआपल्या पालनकर्त्याच्या भेटीपर्यंत, हे प्रयत्न आणि सर्व कामे, आणि काबाडकष्ट करून त्याला भेटणार आहेस[१] (६)

فَاَمَّا مَنْ اُوْتِيَ كِتٰبَهٗ بِيَمِيْنِهٖ ۙ﴿٧﴾
तर (त्यावेळी) ज्या मनुष्याच्या उजव्या हातांत कर्मपत्र देण्यांत येईल (७)

فَسَوْفَ يُحَاسَبُ حِسَابًا يَّسِيْرًا ۙ﴿٨﴾
त्याचा हिशेब तर फार सोपासा घेतला जाईल.[२] (८)

وَّيَنْقَلِبُ اِلٰۤى اَهْلِهٖ مَسْرُوْرًا ؕ﴿٩﴾
आणि तो आपल्या कुटुंबाकडे हर्षभरीत होऊन परत येईल.[३] (९)

وَاَمَّا مَنْ اُوْتِيَ كِتٰبَهٗ وَرَآءَ ظَهْرِهٖ ۙ﴿١٠﴾
होय! परंतु ज्या मनुष्याचे कर्मपत्र त्याला, त्याच्या पाठीमागून दिले जाईल. (१०)

فَسَوْفَ يَدْعُوْا ثُبُوْرًا ۙ﴿١١﴾
तर तो मृत्यूला बोलावू लागेल.[४] (११)

وَّيَصْلٰى سَعِيْرًا ؕ﴿١٢﴾
आणि धगधगणाऱ्या नरकाग्नीत जाऊन दाखल होईल. (१२)

اِنَّهٗ كَانَ فِيْۤ اَهْلِهٖ مَسْرُوْرًا ؕ﴿١٣﴾
हा मनुष्य आपल्या बायका पोरांत (जगामध्ये) आनंदी होता.[५] (१३)

اِنَّهٗ ظَنَّ اَنْ لَّنْ يَّحُوْرَ ۚ﴿١٤﴾
तो ही कल्पना करीत होता की तो अल्लाहकडे परतून जाणारच नाही[६] (१४)

بَلٰۤى ۚ اِنَّ رَبَّهٗ كَانَ بِهٖ بَصِيْرًا ؕ﴿١٥﴾
का नाही? वास्तविक [७] त्याचा पालनकर्ता त्याला चांगल्याप्रकारे पहात होता.[८] (१५)

فَلَاۤ اُقْسِمُ بِالشَّفَقِ ۙ﴿١٦﴾
तर तर मला शफक[९] (संधी प्रकाश) ची शपथ! (१६)

وَالَّيْلِ وَمَا وَسَقَ ۙ﴿١٧﴾
आणि रात्रीची! आणि ज्यावर ती आच्छादते त्या[१०] वस्तूची शपथ! (१७)

وَالْقَمَرِ اِذَا اتَّسَقَ ۙ﴿١٨﴾
आणि परिपूर्ण चंद्राची शपथ![११] (१८)

لَتَرْكَبُنَّ طَبَقًا عَنْ طَبَقٍ ؕ﴿١٩﴾
की, खचित्च तुम्ही लोक एका स्थितीतून दुसऱ्या स्थितीत पोहचत जाल.[१२] (१९)

فَمَا لَهُمْ لَا يُؤْمِنُوْنَ ۙ﴿٢٠﴾
त्यांना काय होऊन गेले की, ईमान आणित नाहीत? (२०)

وَاِذَا قُرِئَ عَلَيْهِمُ الْقُرْاٰنُ لَا يَسْجُدُوْنَ ؕ﴿٢١﴾ السجدة
आणि जेव्हा यांच्याजवळ कुरआन वांचले जाते तर सजद: करीत नाही?[१३] (२१)

بَلِ الَّذِيْنَ كَفَرُوْا يُكَذِّبُوْنَ ۫ۖ﴿٢٢﴾
किंबहुना ज्यांनी कुफ्र केले ते त्याला खोटे ठरवत आहेत.[१४] (२२)

وَاللّٰهُ اَعْلَمُ بِمَا يُوْعُوْنَ ۫ۖ﴿٢٣﴾
आणि अल्लाहतआला चांगल्या प्रकारे जाणतो, जे काही हे मनांत[१५] बाळगतात (२३)

فَبَشِّرْهُمْ بِعَذَابٍ اَلِيْمٍ ۙ﴿٢٤﴾
त्यांना दु:खदायक शिक्षेचे शुभवर्तमान ऐकवून टाका. (२४)

اِلَّا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ لَهُمْ اَجْرٌ غَيْرُ مَمْنُوْنٍ ۠﴿٢٥﴾
परंतु होय! ईमानवाल्यांना आणि चांगली कामे करणाऱ्यांना, बेसुमार आणि न संपणारा चांगला मोबदला आहे. (२५)

१) येथे मनुष्य एक व्यक्तिमत्त्व म्हणून आहे. ज्यात ईमानवाले आणि काफिर दोन्ही शामील आहेत. 'कदह' फार काबाड कष्टाला म्हणतात. मग ते कष्ट भलाईच्या कामासाठी असोत किंवा वाईटासाठी. अर्थ हा आहे की, जेव्हा चर्चित गोष्टी दिसून येतील, म्हणजे कयामत घडून येईल. तेव्हा हे मानवा! तू जे काही चांगले किंवा वाईट कर्मे केले असेल ते तूंआपल्या समोर हजर पावशील. आणि त्याच्याप्रमाणे तुला चांगला किंवा वाईट मोबदला सुद्धा मिळेल. पुढे याचा आणखी तपशील आणि खुलासा आहे.

२) सोपा हिशेब हा आहे की, ईमानवाल्याचे कर्मपत्र सादर होईल. त्याच्या चुकापण त्याच्या समोर आणल्या जातील. मग अल्लाहतआला आपली दया, औदार्य आणि कृपेने त्यांना माफ करून टाकील. ह.आयेशा ﵂ फर्मावितात की, रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, ''ज्याचा हिशेब घेतला गेला तो गारद झाला. मी म्हटले हे अल्लाहच्या पैगंबरा! अल्लाह मला आपल्यावर वारून देवो! काय अल्लाहतआलाने हे नाही सांगितले, ज्याच्या उजव्या हातांत कर्म पत्र दिले गेले, त्याचा हिशेब सोपाच होईल. (अर्थ ह. आयेशा ﵂ चा होता, की या महावाक्याच्या अनुषंगाने हिशेब तर ईमानवाल्यांचा पण होईल, पण तो गारद होणार नाही) आपण ﷺ नी खुलासा केला, ''हे तर सादर करणे आहे. (म्हणजे ईमानवाल्याबरोबर हिशेबाचा मामला होणार नाही; एक वरवरचे सादर करणे होईल.) ईमानवाले आपल्या पालनकर्त्यासमोर हजर केले जातील ज्याच्याशी चर्चा झाली, म्हणजे विचारणा झाली, तो ठार झाला. (स.बुखारी, तफसीर, सू.इन्शिकाक) एका आणखी रिवायतीमध्ये ह.आयेशा ﵂ फर्मावितात, नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लम आपल्या काही नमाजीमध्ये ही प्रार्थना करीत असत, ''अल्लाहुम्म हासिब्नी हिसाबय् यसीरा'' (हे अल्लाह! माझा सोपासा हिशेब घ्यावा!) नमाजीतून मुक्त झाल्यानंतर, मी विचारले, हिसाबे यसीर (सोपा हिशेब) चा काय अर्थ आहे? आपण सल्ल. नी फर्माविले अल्लाहतआला त्याचे कर्मपत्र पाहील. आणि मग त्याला क्षमा करून टाकेन. ....... (मुसनद अहमद ४८/६)

३) म्हणजे जे याच्या कुटुंबियांपैकी स्वर्गवासीय असतील. किंवा याच्याने अभिप्रेत त्या मोठ्या डोळ्यांच्या अप्सरा आणि लहान मुले आहेत, जी स्वर्ग वासियांना मिळतील.

४) 'सबुरन्' गारद होणे किंवा घाटा. म्हणजे तो ओरडेल, बोलावील, आक्रोश करील, की मी तर मारला गेलो, बर्बाद झालो.

५) म्हणजे इहलोकांत आपल्या मनोकामनेत मग्न, आणि कुटुंबीयांच्या दर्म्यान फार आनंदात होता.

६) हे त्याच्या आनंदीत होण्याचे कारण आहे. म्हणजे परलोकावर त्याची धारणाच नव्हती. 'हवरुन' चा अर्थ आहे. परतणे ज्याप्रमाणे नबी ﷺ ची दुआ आहे. ''अल्लाहुम्म इन्नी आऊजोबिका मिनल हव्रे बादल कौर'' (स.मुस्लिम,इब्ने माजा) मुस्लिममध्ये 'बादल कव्न' आहे. अर्थ आहे, ''हे अल्लाह! या गोष्टीपासून मी तुझा आश्रय मागतो की, ईमानाच्या नंतर कुफ्र, आज्ञापालनानंतर गुन्हेगारी, किंवा भलाईच्या नंतर वाईटाकडे, मी परत जावे.''

७) की याने परतू नये, आणि दुसऱ्यांदा जिवंत होऊ नये किंवा 'बला' का नाही? हा जरूर आपल्या पालनकर्त्याकडे परतेल.

८) म्हणजे त्याच्यापासून त्याचे कुठलेही कर्म गुप्त नव्हते.

९) 'शफक' त्या लालीमाला म्हणतात, जी सूर्यास्त झाल्यानंतर आकाशांत दिसते आणि 'ईशा' चा वेळ सुरू होण्यापर्यंत रहाते.

१०) अंधार पडतांच प्रत्येक वस्तू आपल्या मूळ आणि ठिकाणाकडे जमा होऊन जाते आणि आकसून येते. म्हणजे रात्रीचा अंध:कार ज्या वस्तूंना आपल्या पदराखाली झांकून घेतो.

११) 'इजत्तसक' चा अर्थ आहे जेव्हा तो परिपूर्ण होऊन जाईल, जसा तो तेराव्या रात्रीपासून सोळाव्या रात्रीपर्यंत राहतो.

१२) 'तबक' चा खरा अर्थ कठीणतेचा आहे. येथे अभिप्रेत त्या कठीणता आहेत, ज्या कयामतच्या दिवशी घडून येतील. म्हणजे त्या दिवशी एकाहून एक वरचढ कठीण अवस्था होत जातील. (फत्हूल बारी, तफसीर सू.इन्शिकाक)

१३) हदीशींनी येथे, नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लम आणि सहाबा करामचा सिजद: करणे सिद्ध आहे. ही आयते सजद: आहे. म्हणजे हे महावाक्य वाचल्यानंतर सजदा: करणे सुन्नत आहे. कुरआनात अशाप्रकारे पंधरा ठिकाणी असा सजदा: केला गेला आहे.

१४) म्हणजे ईमान आणण्याच्या ऐवजी खोटे ठरवतात.

१५) म्हणजे खोटे बोलणे किंवा जी कामे ते लपून (गुपचूप) करतात.

# (८५) सू. अल-बुरूज

महावाक्ये २२ रुकूअ १

﴿ اٰیاتها ٢٢ (٨٥) سُوْرَةُ الْبُرُوْجِ مَكِّيَّةٌ (٢٧) رُكُوْعُهَا ١ ﴾

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

وَالسَّمَآءِ ذَاتِ الْبُرُوْجِ ۝١
**बुरुज (ताऱ्यांच्या कक्षा) वाल्या आकाशाची शपथ[१] १**

وَالْيَوْمِ الْمَوْعُوْدِ ۝٢
**अभिवचन दिलेल्या दिवसाची शपथ[२] २**

وَشَاهِدٍ وَّمَشْهُوْدٍ ۝٣
**हजर होणाऱ्यांची आणि हजर केल्या गेलेल्यांची शपथ[३] ३**

قُتِلَ اَصْحٰبُ الْاُخْدُوْدِ ۝٤
**की खंदक वाले ठार केले गेलेत.[४] ४**

النَّارِ ذَاتِ الْوَقُوْدِ ۝٥
**ती एक इंधनवाली आग होती.[५] ५**

اِذْ هُمْ عَلَيْهَا قُعُوْدٌ ۝٦
**जेव्हा की हे लोक तिच्या आजुबाजूला बसले होते.[६] ६**

وَّهُمْ عَلٰى مَا يَفْعَلُوْنَ بِالْمُؤْمِنِيْنَ شُهُوْدٌ ۝٧
**आणि मुसलमानांबरोबर जे करीत होते, ते प्रत्यक्ष पाहत होते. ७**

وَمَا نَقَمُوْا مِنْهُمْ اِلَّآ اَنْ يُّؤْمِنُوْا بِاللّٰهِ الْعَزِيْزِ الْحَمِيْدِ ۝٨
**हे लोक या मुसलमानांच्या (कोण्या इतर गुन्ह्याचा) बदला घेत नव्हते; याशिवाय की त्यांनी अल्लाह परम समर्थ आणि सुस्तुत्यवर ईमान आणले होते.[७] ८**

الَّذِيْ لَهٗ مُلْكُ السَّمٰوٰتِ وَالْاَرْضِ ۭ وَاللّٰهُ عَلٰى كُلِّ شَيْءٍ شَهِيْدٌ ۝٩
**ज्याच्याकरीता आकाश आणि पृथ्वीचे राज्य आहे. आणि अल्लाहतआला प्रत्येक गोष्टीला साक्ष आणि खूप वाकबगार आहे. ९**

اِنَّ الَّذِيْنَ فَتَنُوا الْمُؤْمِنِيْنَ وَالْمُؤْمِنٰتِ ثُمَّ لَمْ يَتُوْبُوْا فَلَهُمْ عَذَابُ جَهَنَّمَ وَلَهُمْ عَذَابُ الْحَرِيْقِ ۝١٠
**नि:संशय ज्या लोकांनी मुसलमान पुरूष आणि स्त्रियांचा छळ केला, मग तौबा (सुद्धा) केली नाही, त्यांच्याकरीता नरकाग्नीची शिक्षा आहे, आणि जळण्याची शिक्षा आहे. १०**

✪ नबी ﷺ जुहर आणि असरच्या नमाजीत सू. तारिक आणि सू. बुरुज पढत असत. (तिर्मिझी)

१) 'बुरुज' बुर्जचे अनेकवचन आहे. (बुर्ज-महाल) बुर्ज चा मूळ अर्थ आहे जाहीर होणे. या नक्षत्रांच्या कक्षा आहेत. ज्यांना त्यांच्या महालांची स्थिती प्राप्त आहे. उघड आणि ठळक असल्यामुळे त्यांना बुरूज (महाल) म्हणण्यांत येते. तपशिलाकरीता पहावे सू. फुर्कान आ. ६१ चा समास. काहींनी बुरूज ने अभिप्रेत तारे घेतले आहे. म्हणजे ताऱ्यावाल्या आकाशाची शपथ! काहींच्या जवळ याच्याने आकाशाचे दरवाजे किंवा चंद्राच्या कक्षा अभिप्रेत आहेत. (फत्हुल कदीर)

२) याच्याने अभिप्रेत सर्वानुमते कयामतचा दिवस आहे.

३) शाहिद आणि मशहूदच्या भाष्यांत पुष्कळ मतभेद आहेत. ईमाम शौकानीने हदीशी आणि आसारच्या आधारावर म्हटले आहे की, शाहिद ने अभिप्रेत शुक्रवार चा दिवस आहे. यादिवशी ज्याने जे पण कर्म केले असेल; हे कयामतच्या दिवशी त्याची साक्ष देईल. आणि मशहूदने अर्फा (९ जिल्हज्ज) चा दिवस आहे. जेथे लोक हजकरीता जमा आणि हजर होतात.

४) म्हणजे ज्या लोकांनी खंदक खोदून, त्यांत अल्लाहला मानणाऱ्यांना ठार केले. त्यांच्याकरीता तबाही आणि बर्बादी आहे.

५) म्हणजे खंदक काय होते ? इंधनवाली आग होती; जी ईमानवाल्यांना तिच्यांत झोकून देण्यासाठी पेटविण्यांत आली होती.

६) काफिर राजा आणि त्याचे चेले, चमचे आगीच्या किनाऱ्यावर बसून, ईमानवाल्यांच्या जळण्याचा तमाशा पाहत होते. जसे की पुढील महावाक्यात आहे.

७) म्हणजे त्या लोकांचा अपराध, ज्यांना आगीत झोकून देण्यांत येत होते, हा होता की, त्यांनी परम समर्थ अल्लाहवर ईमान आणले होते. या घटनेचा तपशील, जो सहीह हदीशींनी सिद्ध आहे, थोडक्यांत खालीलप्रमाणे आहे.

# खंदकवाल्यांची गोष्ट

मागील काळांत एका राजाचा एक जादूगीर आणि मांत्रिक होता. जेव्हा तो मांत्रिक म्हातारा होऊन गेला. तेव्हा त्याने बादशाहला म्हटले की मला एक हुशार मुलगा द्या ! ज्याला मी ही विद्या शिकवून द्यावी. म्हणून बादशाहने एक समजदार मुलगा शोधून, त्याच्या सुपूर्द करून दिला. मुलाच्या मार्गात एका राहीबचे (पुण्यवान विद्वान) घर होते. हा मुलगा येता जाता त्याचेजवळपण बसत असे, आणि त्याच्या गोष्टी ऐकत असे. ज्या त्याला चांगल्या वाटत. अशाच प्रकारे क्रम चालू राहिला. एकदा हा मुलगा जात होता की, रस्त्यांत एका फार मोठ्या जनावराने (वाघ किंवा सांप वगैरे) लोकांचा मार्ग अडवून ठेवला होता. मुलाने विचार केला, आज मी ठाऊक करुन घेतो की, जादूगीर बरोबर आहे का राहीब? मग त्याने एक दगड उचलला आणि म्हटले, ''हे अल्लाह! जर राहीबचा मामला तुझ्याजवळ, जादूगीराच्या मामल्यापेक्षा उत्तम आणि आवडता आहे, तर या जनावराला मारून टाक; की लोकांचे येणे जाणे चालू होऊन जावे.'' असे म्हणून त्याने दगड मारला. आणि ते जनावर मरून गेले. मुलाने जाऊन ही गोष्ट राहीबला सांगितली. राहीबने म्हटले मुला! आता तू (अल्लाहच्या) कृपेला, आणि कमालीला पोहचून गेला आहेस ! आणि आता तुझी कसोटी घेणे सुरू होणार आहे. परंतु या कसोटीच्या काळांत माझे नाव जाहीर करू नकोस. हा मुलगा जन्मजात आंधळे, कोड आणि दुसऱ्या काही आजारांचा पण इलाज करीत असे. परंतु अल्लाहवर ईमान आणण्याच्या शर्तीवर. या अटीवर त्याने बादशाहच्या एका आंधळ्या खास मित्राचे डोळे सुद्धा, अल्लाहजवळ दुआ करून, चांगले करून दिले. हा मुलगा हेच सांगत असे की, जर तुम्ही ईमान घेऊन आलात, तर मी अल्लाहजवळ दुआ करीन, तो तुम्हांस तंदुरुस्ती बहाल करील. म्हणून अल्लाहतआला त्याच्या दुआने चांगले करून देई. ही बातमी बादशाहपर्यंत पण पोहोचली, तेव्हा तो फारच चिंतीत झाला. काही ईमानवाल्यांना तर त्याने ठार करून टाकले. त्या मुलाच्या बाबतीत, त्याने काही माणसांना सांगितले की, त्याला पर्वताच्या शिखरावर नेऊन खाली फेकून द्या! (त्याचे कडेलोट करा!) त्याने अल्लाहजवळ दुआ केली. पर्वत थरथर कांपला, ज्यामुळे ते सर्व खाली पडून मरून गेले, आणि अल्लाहने त्याला वांचवून घेतले. बादशाहने त्याला दुसऱ्या माणसांच्या हवाली करून सांगितले की, याला नावेत बसवून, समुद्राच्या मध्यांत घेऊन जाऊन त्याला फेकून द्या. तेथेपण त्याच्या दुआने नांव उलटून गेली; ज्यामुळे ते सर्व बुडून गेले. आणि हा वांचून गेला. मुलाने बादशाहला म्हटले, जर तू मला मारू इच्छितोस तर त्याची पद्धत ही आहे की, एका खुल्या मैदानात लोकांना गोळा कर आणि 'बिस्‌मिल्लाही रब्बिल गुलाम' अल्लाहच्या नावाने जो या मुलाचा पालनकर्ता आहे. म्हणून मला बाण मार. बादशाहने असेच केले. ज्याने तो मुलगा तर मरण पावला, परंतु सर्व लोक बोलून उठले की, आम्ही या मुलाच्या अल्लाहवर ईमान आणले. बादशाह आणखी जास्त चिंतीत झाला. म्हणून त्यांने खंदक खोदविले आणि त्याच्यांत आग पेटविली. आणि हुकूम दिला की, जो ईमानापासून फिरणार नाही, त्याला आगीत फेंकून द्या! अशाप्रकारे ईमानवाले येत राहिले आणि आगीच्या हवाली होत राहिले; येथ पावेतो की एक स्त्री आली, जिच्याबरोबर एक मूल होते. ती जरा चल बिचल झाली. तेव्हा ते मूल बोलून पडले, ''आई धीर धर तू सत्त्यावर आहेस!'' (स.मुस्लिम) ईमाम इब्ने कसीरने आणखी पण काही वृत्तांत नोंदविले आहेत. जे याहून वेगळे आहेत. आणि म्हटले आहे, शक्यता आहे की, अशा प्रकारच्या अनेक घटना निरनिराळ्या ठिकाणी झाल्या असतील. (तपशीला करीता पहावे, तफसीर इब्ने कसीर)

إِنَّ الَّذِينَ آمَنُوا وَعَمِلُوا الصَّالِحَاتِ لَهُمْ جَنَّاتٌ تَجْرِي مِن تَحْتِهَا الْأَنْهَارُ ۚ ذَٰلِكَ الْفَوْزُ الْكَبِيرُ ﴿١١﴾

नि:संशय ईमान कबूल करणाऱ्यांसाठी आणि चांगली कामे करणाऱ्यांसाठी त्या बागा आहेत, ज्यांच्या खालून पाण्याचे पाट वहात आहेत. हेच मोठे साफल्य आहे. (११)

إِنَّ بَطْشَ رَبِّكَ لَشَدِيدٌ ﴿١٢﴾

खचित्‌च तुझ्या पालनकर्त्याची पकड फारच सक्त आहे. [१] (१२)

إِنَّهُ هُوَ يُبْدِئُ وَيُعِيدُ ﴿١٣﴾

तोच पहिल्या वेळेस पैदा करतो, आणि तोच दुसऱ्यांदा पैदा करील. [२] (१३)

وَهُوَ الْغَفُورُ الْوَدُودُ ﴿١٤﴾

आणि तो मोठा क्षमाकर्ता आणि फार ममता करणारा आहे. (१४)

ذُو الْعَرْشِ الْمَجِيدُ ﴿١٥﴾

महासिंहासनाचा स्वामी आणि प्रतापशाली आहे. [३] (१५)

فَعَّالٌ لِّمَا يُرِيدُ ﴿١٦﴾

तो जे इच्छितो ते करून टाकतो. [४] (१६)

هَلْ أَتَاكَ حَدِيثُ الْجُنُودِ ﴿١٧﴾

तुला सैन्याची बातमी पण पोहोचली आहे? [५] (१७)

فِرْعَوْنَ وَثَمُودَ ﴿١٨﴾

(म्हणजे) फिरऔन आणि समूद ची (१८)

بَلِ الَّذِينَ كَفَرُوا فِي تَكْذِيبٍ ﴿١٩﴾

(काही नाही,) किंबहुना काफिर तर खोटे ठरवण्यात लागून आहेत (१९)

وَاللَّهُ مِن وَرَائِهِم مُّحِيطٌ ﴿٢٠﴾

आणि अल्लाहतआला सुद्धा त्यांना चोहोबाजूने घेरून आहे. [६] (२०)

بَلْ هُوَ قُرْآنٌ مَّجِيدٌ ﴿٢١﴾

किंबहुना हे महनीय कुरआन आहे. (२१)

فِي لَوْحٍ مَّحْفُوظٍ ﴿٢٢﴾

'लौहे महफूज' मध्ये (लिहिलेले) [७] (२२)

१) म्हणजे जेव्हा तो आपल्या शत्रूंची पकड करण्यावर तयार होतो, जे त्याच्या पैगंबरांना खोटे ठरवतात आणि त्याच्या हुकुमांचा विरोध करतात. तर मग त्याच्या पकडीपासून त्यांना कोणी वांचवू शकत नाही.

२) म्हणजे तोच आपली शक्ती आणि पूर्ण सामर्थ्याने, पहिल्या वेळेस निर्माण करतो; आणि मग कयामतच्या दिवशी दुसऱ्यांदा त्यांना अशाच प्रकारे निर्माण करील, ज्याप्रमाणे त्याने पहिल्या वेळेस पैदा केले होते.

३) म्हणजे तमाम सृष्टीहून महान आणि उच्च आहे. आणि महासिंहासन जे सर्वांच्यावर आहे, ते त्याचे ठिकाण आहे. जशी की सहाबा, ताबेईन, आणि मुहद्दीसीनची धारणा आहे.

४) म्हणजे तो जे इच्छितो ते करून टाकतो, त्याच्या हुकूम आणि मर्जीला कोणी टाळणारा नाही, न त्याला कोणी विचारणा करणारा आहे. ह.अबुबकर सिद्दीक ﵁ ला, त्यांच्या मृत्यूच्या आजारांत कोणी तरी विचारले, काय कोण्या वैद्याने (तबीब) आपणांस बघितले? त्यांनी फर्माविले, होय! विचारले त्याने काय सांगितले? फर्माविले त्याने सांगितले आहे, ''इन्नी फआलुल् लिमा उरीद'' मी जे इच्छील, करून टाकेन. माझ्या मामल्यांत कोणी हस्तक्षेप करणार नाही. (इब्ने कसीर) अर्थ हा होता की, मामला आता वैद्याच्या हातांत राहिला नाही. माझी शेवटची घटका भरत आली आहे. आणि अल्लाहच माझा वैद्य आहे. ज्याच्या मर्जीला टाळण्याचे कोणाच्यांत सामर्थ्य नाही.

५) म्हणजे याच्यावर जेव्हा माझी शिक्षा आली; आणि मी त्यांना आपल्या पकडीत घेऊन घेतले, ज्याला कोणी टाळूशकले नाही.

६) हे 'इन्न बत्‌श रब्बिक लशदीद' चे मान्य करणे आणि त्याची ताकीद आहे.

७) म्हणजे लौहे महफूज मध्ये लिहलेले आहे. जेथे देवदूत त्याच्या संरक्षणावर तैनात आहेत.

✿ ह.खालिद अुदवानी ﵁ म्हणतात मी रसूलुल्लाह ﷺ ला सकीफच्या बाजारांत कमान किंवा काठीच्या आधारावर उभे पाहिले. आपण ﷺ त्यांच्याजवळ त्यांच्यापासून मदत मिळविण्यासाठी आले होते. मी तेथे आपल्याकडून सू.तारिक ऐकला. मी त्याला पाठ करून घेतले; वास्तविक मी आतापर्यंत मुसलमान झालो नव्हतो. मग मला अल्लाहने इस्लाम बहाल करून दिला. मग मी इस्लामच्या स्थितीत त्याला पढले. (मुसनद अहमद) ह.मुआज ﵁ नी एकदा मगरीबच्या नमाजीत सू.बकर: आणि सू.निसा पढली. नबी ﷺ ला समजले, तेव्हा फर्माविले, तू लोकांना फितन्यांत टाकतो? तुला हेच पुरेसे होते की, वस्समाई वत्तरिक आणि वश्शम्स वगैरे सारखे सुरे पढता! (निसाई)

آياتها ١٧ (٨٦) سُورَةُ الطَّارِقِ مَكِّيَّةٌ (٣٦) رُكُوعُها ١

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

महावाक्ये १७

# (८६) सू. तारिक

रुकूअ १

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

وَالسَّمَآءِ وَالطَّارِقِ ۙ﴿۱﴾
शपथ आहे आकाशाची आणि अंधारात प्रकाशित होणाऱ्याची (१)

وَمَاۤ اَدۡرٰىكَ مَا الطَّارِقُ ۙ﴿۲﴾
तूला काय समजले की रात्री दिसणारी वस्तू काय आहे ? (२)

النَّجۡمُ الثَّاقِبُ ۙ﴿۳﴾
तो चकाकणारा तारा आहे[१] (३)

اِنۡ كُلُّ نَفۡسٍ لَّمَّا عَلَيۡهَا حَافِظٌ ؕ﴿۴﴾
कोणी पण असा नाही ज्याच्यावर चौकीदार (देवदूत) नसावा.[२] (४)

فَلۡيَنۡظُرِ الۡاِنۡسَانُ مِمَّ خُلِقَ ؕ﴿۵﴾
मनुष्यास पाहिजे की त्याने पहावे की तो कोणत्या वस्तूंपासून निर्माण केला गेला आहे. (५)

خُلِقَ مِنۡ مَّآءٍ دَافِقٍ ۙ﴿۶﴾
तो एका उचंबळून येणाऱ्या पाण्यापासून निर्माण केला गेला आहे.[३] (६)

يَّخۡرُجُ مِنۡۢ بَيۡنِ الصُّلۡبِ وَالتَّرَآئِبِ ؕ﴿۷﴾
जे पाठ आणि छातीच्या मधून निघते. (७)

اِنَّهٗ عَلٰى رَجۡعِهٖ لَقَادِرٌ ؕ﴿۸﴾
नि:संशय तो त्याला परतवून आणण्यावर खचित्‌च सामर्थ्य बाळगतो[४] (८)

يَوۡمَ تُبۡلَى السَّرَآئِرُ ۙ﴿۹﴾
ज्या दिवशी गुप्त भेद उघड होऊन जातील.[५] (९)

فَمَا لَهٗ مِنۡ قُوَّةٍ وَّلَا نَاصِرٍ ؕ﴿۱۰﴾
तर न काही जोर चालेल न कोणी मददगार असेल.[६] (१०)

وَالسَّمَآءِ ذَاتِ الرَّجۡعِ ۙ﴿۱۱﴾
पावसावाल्या आकाशाची शपथ![७] (११)

وَالۡاَرۡضِ ذَاتِ الصَّدۡعِ ۙ﴿۱۲﴾
आणि फाटणाऱ्या जमिनीची शपथ![८] (१२)

१) तारिक ने काय अभिप्रेत आहे? स्वत: कुरआनाने स्पष्ट करून दिले. चकाकणारा तारा. तारिक 'तुरुक' ने आहे. ज्याचा शब्दकोशीय अर्थ ठोठाविण्याचा आहे. परंतु तारिक रात्री येणाऱ्याकरीता उपयोगांत आणला जातो. ताऱ्यांनापण तारिक याचसाठी म्हटले आहे की ते दिवसा लपून जातात आणि रात्री दिसू लागतात.

२) म्हणजे प्रत्येक जिवावर अल्लाहकडून देवदूत तैनात आहेत. जे त्याची चांगली किंवा वाईट कर्मे लिहितात. काही म्हणतात, हे माणसाचे संरक्षण करणारे देवदूत आहेत. जसे की, सू.रअदच्या आ.११ ने माहित होते की माणसाच्या संरक्षणासाठी सुद्धा त्याच्या मागे पुढे देवदूत असतात. ज्याप्रमाणे मनुष्य जे काही बोलतो आणि करतो हे सर्व नोंद करणारे देवदूत असतात.

३) म्हणजे वीर्याने, जे वासनापूर्तीनंतर जोरात निघते. हाच पाण्याचा थेंब (वीर्य) जो स्त्रीच्या गर्भाशयांत जाऊन, जर अल्लाहचा हुकूम झाला, तर गर्भ (रहाण्याला) कारणीभूत होतो.

४) म्हणजे मनुष्याच्या मेल्यानंतर, त्याला दुसऱ्यांदा जिवंत करण्याला तो समर्थ आहे.

५) म्हणजे जाहीर होऊन जातील. कारण यांच्यानंतर मोबदला दिला जाईल. किंबहुना हदीसमध्ये येते, ''प्रत्येक वाडखोरी (वचनभंग) करणाऱ्याच्या कमरेच्या खालच्या भागावर एक झेंडा गाडून दिला जाईल आणि घोषणा करून देण्यांत येईल ही अमक्या अमक्याची बंडखोरी (वचनभंग) आहे. (स.बुखारी स.मुस्लिम) अर्थ हा आहे की, तेथे कोणाचे कुठलेही कर्म गुप्त राहणार नाही.

६) म्हणजे मनुष्याजवळ एवढी शक्ती नसेल की त्याने अल्लाहच्या शिक्षेपासून वांचून जावे. न कोण्या आणखी बाजू कडून त्याला कोणी मददगार मिळू शकावा, जो त्याला अल्लाहच्या शिक्षेपासून वांचवून घेईल.

७) 'रजअुन' चा शब्द कोशीय अर्थ आहे, परतणे, पाऊस सुद्धा पुन्हा पुन्हा आणि परतून परतून होत असतो. म्हणून पावसाला 'रजअुन' च्या शब्दाने संबोधित केले आहे. काही म्हणतात की ढग समुद्रांतूनच पाणी घेतात आणि मग तेच पाणी जमिनीवर परतवून देतात. म्हणून पावसाला 'रजअुन' म्हटले.

८) म्हणजे जमीन फाटते तेव्हा तिच्यातून अंकुर बाहेर पडतो. जमीन फाटते तेव्हा तिच्यातून झरा वाहू लागतो. आणि अशाच प्रकारे एक दिवस येईल की, जमीन फाटेल तेव्हा सर्व मुर्दे जिवंत होऊन बाहेर निघून येतील. म्हणून जमिनीला फाटणारी आणि तडा पाडणारी म्हटले.

إِنَّهُۥ لَقَوْلٌ فَصْلٌ ﴿١٣﴾
नि:संशय हे (कुरआन) अलबत्त्च स्पष्ट निर्णय करणारे (१) अभिवचन आहे. ⑬

وَمَا هُوَ بِٱلْهَزْلِ ﴿١٤﴾
ते काही मस्करीची निरर्थक गोष्ट नव्हे! (२) ⑭

إِنَّهُمْ يَكِيدُونَ كَيْدًا ﴿١٥﴾
तथापि काफिर तर डांव पेच लढवीत आहेत. (३) ⑮

وَأَكِيدُ كَيْدًا ﴿١٦﴾
आणि मी पण डांवपेच करीत आहे. (४) ⑯

فَمَهِّلِ ٱلْكَٰفِرِينَ أَمْهِلْهُمْ رُوَيْدًۢا ﴿١٧﴾
तू काफिरांना अवकाश दे! (५) त्यांना थोड्या दिवसांसाठी सोडून दे ⑰

## (८७) सू. अल-आअला

महावाक्ये १९ | रुकूअ १

سُورَةُ الأَعْلَىٰ مَكِّيَّة (٨٧) | آيَاتُهَا ١٩ | رُكُوعُهَا ١

بِسْمِ ٱللَّهِ ٱلرَّحْمَٰنِ ٱلرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

سَبِّحِ ٱسْمَ رَبِّكَ ٱلْأَعْلَى ﴿١﴾
आपल्या अती महीमाशाली अल्लाहच्या नावाचे पावित्र्य वर्णन कर. (६) ①

ٱلَّذِى خَلَقَ فَسَوَّىٰ ﴿٢﴾
ज्याने निर्माण केले आणि परिपूर्ण बनविले. (७) ②

وَٱلَّذِى قَدَّرَ فَهَدَىٰ ﴿٣﴾
आणि ज्याने (चांगला) अंदाज केला आणि मग मार्ग दाखविला. (८) ③

وَٱلَّذِىٓ أَخْرَجَ ٱلْمَرْعَىٰ ﴿٤﴾
आणि ज्याने ताजे (हिरवे) गवत निर्माण केले. (९) ④

فَجَعَلَهُۥ غُثَآءً أَحْوَىٰ ﴿٥﴾
मग त्याने त्याला (सुकवून) काळा कचरा करून टाकले. (१०) ⑤

१) हे शपथेचे उत्तर आहे. म्हणजे स्पष्ट करून सांगणारा आहे, ज्याने सत्य आणि असत्य स्पष्ट होऊन जाते.

२) म्हणजे खेळ, तमाशा आणि थट्टा मस्करी ची गोष्ट नाही. 'हजलुन' म्हणजे एका स्पष्ट उद्देश्याचे पुस्तक आहे. खेळ तमाशा सारखे निरुद्देश्य नाही.

३) म्हणजे नबी ﷺ, जे सत्यधर्म घेऊन आले आहेत. त्याला अयशस्वी करण्यासाठी कट कारस्थाने करतात किंवा नबी ﷺ ला धोका आणि फसवणुक करण्याचा प्रयत्न करतात. आणि तोंडावर अशा गोष्टी करतात की, मनांत त्याच्या उलट असते.

४) म्हणजे मी यांच्या चाली आणि कारस्थानांकडून गाफील नाही. मी पण त्यांच्या विरूद्ध युक्त्या करीत आहे. किंवा त्यांच्या डावपेचांची तोड करीत आहे. 'कयद' गुप्त युक्त्यांना म्हणतात. जी वाईट उद्देश्याने असेल तर वाईट आहे. आणि उद्देश्य चांगला असेल, तर वाईट नाही.

५) म्हणजे त्यांच्याकरीता शिक्षेची घाई करू नकोस. किंबहुना त्यांना अवकाश दे.

✿ रसूलुल्लाह ﷺ हा सूरह आणि सू.गाशिय: ईद आणि जुम्याच्या नमाजीत, पढत असत. अशाच प्रकारे वितरच्या पहिल्या रकातीत सू.आअला, दुसरीत सू.काफिरून, आणि तिसरीत सू.इखलास पढत असत. ह.मुआज रज़ि. ला ज्या सुऱ्यांच्या पढण्यांची ताकीद केली होती, त्यांच्यात हा पण एक होता. (हदीसमध्ये हा सारा तपशील आलेला आहे.)

६) म्हणजे अशा गोष्टींनी अल्लाहचे पावित्र्य जे त्याच्या योग्य नाही. हदीसमध्ये येते की, नबी ﷺ याच्या उत्तरांत 'सुबहान रब्बीयल् आअला' पढत असत. (मुसनद अहमद २३२/१ अबुदाऊद)

७) सू.इन्फितार चा समास ७ पहावा.

८) म्हणजे पाप आणि पुण्याची. अशाच प्रकारे जीवनाच्या आवश्यकतांची ही सुबुद्धी जनावरांना पण बहाल केली. 'कद्दर' चा भावार्थ आहे. वस्तूंचे वर्ग, त्यांचे नाना प्रकार, त्यांची विशेषणे आणि वैशिष्ट्ये, यांचा अंदाज करून मानवाचे त्याच्याकडे मार्गदर्शन केले, जेणे करून मनुष्याने त्याच्याकडून फायदा उचलू शकावा.

९) ज्यांवर जनावरे चरतात.

१०) गवत वाळून जाईल तर त्याला 'गुसाअ्' म्हणतात. 'अहवा' काळे करून टाकले म्हणजे ताज्या लसलशीत गवताला वाळवून, आम्ही काळे कचरे पण करून टाकतो.

**आम्ही तुला (अशा चांगल्याप्रकारे) पढवून देऊ (की) मग तू विसरणार नाहीस.**[१] ⑥ سَنُقْرِئُكَ فَلَا تَنْسَىٰ ۙ ٦

**परंतु जे काही अल्लाह इच्छील; तो उघड आणि गुप्त गोष्टींना जाणतो.**[२] ⑦ إِلَّا مَا شَاءَ اللَّهُ ۚ إِنَّهُ يَعْلَمُ الْجَهْرَ وَمَا يَخْفَىٰ ٧

**आम्ही आपल्या करीता सुलभता निर्माण करून देऊ.**[३] ⑧ وَنُيَسِّرُكَ لِلْيُسْرَىٰ ۚ ٨

**तर आपण उपदेश करीत रहा. जर उपदेश करणे फलद्रुप होत असेल.**[४] ⑨ فَذَكِّرْ إِنْ نَفَعَتِ الذِّكْرَىٰ ٩

**(अल्लाहला) भिणारे तर बोध ग्रहण करून घेतील.**[५] ⑩ سَيَذَّكَّرُ مَنْ يَخْشَىٰ ۙ ١٠

**आणि अति दुर्भागी लोक त्याच्यापासून दुरच राहतील.**[६] ⑪ وَيَتَجَنَّبُهَا الْأَشْقَى ۙ ١١

**जे मोठ्या आगीत (म्हणजे नरकाग्नीत) जातील.** ⑫ الَّذِي يَصْلَى النَّارَ الْكُبْرَىٰ ۚ ١٢

**जेथे मग न ते मरतील आणि न (सुखाने) जगतील.**[७] **(किंबहुना मरणासन्न अवस्थेत पडून राहतील.)** ⑬ ثُمَّ لَا يَمُوتُ فِيهَا وَلَا يَحْيَىٰ ۚ ١٣

**नि:संशय त्या लोकांनी साफल्य मिळविले, जे शुचिर्भूत झाले.**[८] ⑭ قَدْ أَفْلَحَ مَنْ تَزَكَّىٰ ۙ ١٤

१) जेव्हा ह.जिब्रईल (स.) वह्य घेऊन येतात, तेव्हा त्याला आपण ﷺ लवकर लवकर पढत जेणेकरून विसरू नये. अल्लाहतआलाने फर्माविले, अशा प्रकारे घाई करू नये. अवतरीत वह्य आम्ही आपणांकडून म्हणवून घेऊ. म्हणजे आपल्या तोंडाने चालू करवून घेऊ. मग आपण ﷺ त्याला विसरणार नाही, परंतु ज्याला अल्लाह इच्छील; परंतु अल्लाहने असे इच्छिले नाही. म्हणून आपणांस सर्व काही पाठ राहिले. काहींनी म्हटले की, याचा भावार्थ हा आहे की, ज्याला अल्लाह 'मन्सूख' (रद्द) करू इच्छील, ते आपल्याला ﷺ विसरून टाकेल. (फत्हुल कदीर)

२) मोठ्याने वांचल्या जाणाऱ्या कुरआनाचा तो भाग सुद्धांआहे ज्याला रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी पाठ करून घ्यावे. आणि जो आपल्या अंत:करणांतून लुप्त करून दिला जाईल, तो गुप्त आहे.

३) उदाहरणार्थ आम्ही आपल्यावर वह्य सुलभ करून देऊ; जेणे करून याला पाठ करणे आणि त्यावर अंमलबजावणी करणे, सोपे होऊन जावे. आम्ही आपल्याला त्या पद्धतीकडे मार्गदर्शन करू, जी सोपी असेल. आम्ही आपल्याला स्वर्गवाले कर्म करणे सोपे करून देऊ. आम्ही आपल्याकरीता असे करणे आणि म्हणणे, सोपे करून देऊ, ज्यात भलाई असेल; आणि आम्ही आपल्या करीता असे धर्मशास्त्र निश्चित करून देऊ. जे सोपे, सरळ मार्गाचे आणि जे मध्यममार्गी असेल. ज्यांत कोणी वांकडेपणा, कठीणता, आणि तंगी असणार नाही.

४) म्हणजे प्रवचन व उपदेश तेथे करावा, जेथे वाटत असेल की फलद्रुप होईल. हे प्रवचन व उपदेश आणि शिक्षणाकरीता एक तत्त्व आणि नियम सांगून टाकला. (इब्ने कसीर) ईमाम शौकानीजवळ भावार्थ हा आहे की, आपण ﷺ नी उपदेश करीत रहावा. मग फलद्रुप होवो न होवो. कारण भिवविणे आणि प्रचार दोन्ही आपल्यासाठी आवश्यक होता.

५) म्हणजे आपल्या उद्देश्याने खचित्च ते बोध घेतील, ज्यांच्या मनांत अल्लाहचे भय असेल. त्यांच्यात अल्लाहचे भय आणि स्वत:ची सुधारणाची भावना आणखी बळकट होऊन जाईल.

६) म्हणजे या उपदेशाने फायदा उचलूशकणार नाहीत. कारण की, त्यांचे कुफ्रवर अडून राहणे, आणि अल्लाहच्या आज्ञाभंजनात व्यस्त रहाणे चालूच राहते.

७) याच्या उलट जे लोक फक्त आपल्या अपराधांची शिक्षा भोगण्यासाठी तात्पुरत्या स्वरुपांत नरकाग्नीत राहून गेले असतील, त्यांना अल्लाहतआला एका प्रकारे मृत्यू देऊन देईल, येथ पावेतो की, ते आगीत जळून कोळसा होऊन जातील. मग अल्लाहतआला, पैगंबर लोक वगैरेंच्या शिफारशीने त्यांना गटांच्या स्वरूपांत काढेल; त्यांना स्वर्गाच्या (पाण्याच्या) पाटांत टाकण्यांत येईल. स्वर्गवासी पण त्यांच्यावर पाणी टाकतील, ज्याच्याने ते अशाप्रकारे जीवंत होऊन उठतील, जसा पुराच्या केरकचऱ्यांत दाणा उगवून येतो. (स.मुस्लिम)

८) ज्यांनी आपल्या जिवांला दुर्गुणांनी आणि अंत:करणांना शिर्क आणि पापांच्या घाणीपासून पवित्र करून घेतले

وَذَكَرَ اسْمَ رَبِّهِ فَصَلَّىٰ ﴿١٥﴾
**आणि ज्याने आपल्या पालनकर्त्याचे नामस्मरण केले आणि नमाज पढत राहिले. (१५)**

بَلْ تُؤْثِرُونَ الْحَيَاةَ الدُّنْيَا ﴿١٦﴾
**परंतु तुम्ही तर इहलोकाचे जगणे समोर ठेविता. (१६)**

وَالْآخِرَةُ خَيْرٌ وَأَبْقَىٰ ﴿١٧﴾
**आणि परलोक तर फारच उत्तम आणि फारच चिरस्थायी आहे.[१] (१७)**

إِنَّ هَٰذَا لَفِي الصُّحُفِ الْأُولَىٰ ﴿١٨﴾
**या गोष्टी पूर्वीच्या पुस्तकांमध्ये सुद्धाआहेत. (१८)**

ع ١ ١٩ ١٢ صُحُفِ إِبْرَاهِيمَ وَمُوسَىٰ ﴿١٩﴾
ع १ १९ १२ **(म्हणजे) इब्राहीम आणि मूसाच्या पुस्तकांमध्ये. (१९)**

آياتها ٢٦ (٨٨) سُورَةُ الْغَاشِيَةِ مَكِّيَّةٌ (٦٨) رُكُوعُهَا ١

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

महावाक्ये २६ | **(८८) सू. अल-गाशिय:** | रुकूअ १

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

هَلْ أَتَاكَ حَدِيثُ الْغَاشِيَةِ ﴿١﴾
**काय तुला सुद्धा लपवून ठेवणाऱ्या (कयामत) ची बातमी पोहचली आहे?[२] (१)**

وُجُوهٌ يَوْمَئِذٍ خَاشِعَةٌ ﴿٢﴾
**त्या दिवशी पुष्कळशी तोंडे अपमानीत झालेली असतील.[३] (२)**

عَامِلَةٌ نَاصِبَةٌ ﴿٣﴾
**आणि संकटात पडल्याने, थकलेल्या स्थितीत असतील.[४] (३)**

تَصْلَىٰ نَارًا حَامِيَةً ﴿٤﴾
**ते धगधगत्या आगीत जातील. (४)**

تُسْقَىٰ مِنْ عَيْنٍ آنِيَةٍ ﴿٥﴾
**आणि फारच उकळत्या झऱ्याचे पाणी त्यांना पाजण्यात येईल.[५] (५)**

لَيْسَ لَهُمْ طَعَامٌ إِلَّا مِنْ ضَرِيعٍ ﴿٦﴾
**त्यांच्या करीता, कांटेदार वृक्षांशिवाय आणखी काही आहार नसेल.[६] (६)**

لَا يُسْمِنُ وَلَا يُغْنِي مِنْ جُوعٍ ﴿٧﴾
**ज्याने न शरीर पुष्ट होईल न भूकही भागेल. (७)**

وُجُوهٌ يَوْمَئِذٍ نَاعِمَةٌ ﴿٨﴾
**पुष्कळसे चेहरे त्या दिवशी प्रफुल्लीत असतील. (८)**

لِسَعْيِهَا رَاضِيَةٌ ﴿٩﴾
**आपल्या प्रयत्नांनी आनंदीत असतील. (९)**

१) कारण की हे जग आणि त्याची प्रत्येक वस्तू नष्ट होणारी आहे. जेव्हांकी परलोकातील जीवन नित्याचे आणि कायमचे आहे. म्हणून बुद्धीवंत, नष्ट होणाऱ्या वस्तुला, बाकी राहणाऱ्या वस्तुंवर प्राधान्य देत नाहीत.

✪ काही रिवायतीमध्ये आहे की, रसूलुल्लाह ﷺ जुम्याच्या नमाजीमध्ये सू.जुमअ:च्या बरोबर सू.गाशिय: पण पढत असत. (मव्ता इमाम मालीक, बाबुल किराअत फी सलातील जुमअ:)

२) 'गाशिय:' ने अभिप्रेत कयामत आहे. यासाठी की तिची भयानकता साऱ्या सृष्टीला झांकून घेईल.

३) म्हणजे काफिरांच्या चेहऱ्यांवरून. 'खाशिय:' झुकलेले नमलेले आणि उतरलेले. जसा नमाजी, नमाजच्या स्थितीत अल्लाहच्या समोर नम्रता आणि व्याकुळतेने झुकलेला असतो.

४) 'नासिब:' चा अर्थ आहे. थकून चूर चूर होऊन जाणे. म्हणजे त्यांना इतकी कष्टदायक शिक्षा होईल की, इच्याने त्यांची फार वाईट स्थिती होईल. याचा एक दुसरा भावार्थ होईल की, इहलोकात कर्म करून थकलेले असतील, म्हणजे फार कर्म करीत राहिले असतील. परंतु ते कर्म असत्य धर्माप्रमाणे, किंवा बिदअतीवर आधारित असतील. म्हणून उपासना'' आणि ''फारच खूप कर्मे'' असून सुद्धा, ते नरकाग्नीत जातील. म्हणून या भावार्थाच्या अनुषंगाने, ह.इब्ने अब्बास رضي الله عنه नी 'आमिलतून, नासिब:' ने ख्रिस्ती लोक अभिप्रेत धरले आहेत. (स.बुखारी, तफसीर सू.गाशिय:)

५) येथे ते फारच उष्ण, उकळते पाणी अभिप्रेत आहे. ज्याची उष्णता कमालीला पोहचलेली असेल. (फत्हुल कदीर)

६) हा एक कांटेदार वृक्ष असतो. ज्याला वाळल्यानंतर जनावरे सुद्धा खावयांस पसंत करीत नाही. तथापि हा सुद्धा निवडूंगा सारखा एक फारच कडू, बेचव आणि घाणेरडा आहार असेल. जो शरीराला पोषण देणार नाही. आणि त्याच्याने भूकही भागणार नाही.

| | |
|---|---|
| फ़ी जन्नतिन आलियह (١٠) | अत्युच्च स्वर्गात असतील. (१०) |
| لَّا تَسْمَعُ فِيهَا لَاغِيَةً (١١) | तेथे कोणतीही निरर्थक गोष्ट कानांत पडणार नाही. (११) |
| فِيهَا عَيْنٌ جَارِيَةٌ (١٢) | तेथे झरे वाहत असतील. (१२) |
| فِيهَا سُرُرٌ مَّرْفُوعَةٌ (١٣) | (आणि) उंच उंच तक्त असतील. (१३) |
| وَأَكْوَابٌ مَّوْضُوعَةٌ (١٤) | आणि आब खोरे ठेवलेले असतील. (१४) |
| وَنَمَارِقُ مَصْفُوفَةٌ (١٥) | आणि एका रांगेत लावलेले लोड असतील. (१५) |
| وَزَرَابِيُّ مَبْثُوثَةٌ (١٦) | आणि मखमली गालिचे अंथरलेले असतील. [1] (१६) |
| أَفَلَا يَنظُرُونَ إِلَى الْإِبِلِ كَيْفَ خُلِقَتْ (١٧) | काय हे उंटांना पहात नाहीत की ते कशाप्रकारे (विलक्षण) पैदा केले गेले आहेत? [2] (१७) |
| وَإِلَى السَّمَاءِ كَيْفَ رُفِعَتْ (١٨) | आणि आकाशाला की ते कशाप्रकारे रोऊन दिले आहेत? [3] (१८) |
| وَإِلَى الْجِبَالِ كَيْفَ نُصِبَتْ (١٩) | आणि पर्वतांकडील ते कशाप्रकारे गाडण्यात आले आहे? [4] (१९) |
| وَإِلَى الْأَرْضِ كَيْفَ سُطِحَتْ (٢٠) | आणि जमिनीकडे की, ती कशाप्रकारे आंथरली गेली आहे? [5] (२०) |
| فَذَكِّرْ إِنَّمَا أَنتَ مُذَكِّرٌ (٢١) | तर आपण उपदेश करून देत जा, (कारण की) आपण फक्त उपदेश करणारे आहांत [6] (२१) |
| لَّسْتَ عَلَيْهِم بِمُصَيْطِرٍ (٢٢) | तुम्ही त्यांच्यावर काही दारोगा नव्हेत (२२) |
| إِلَّا مَن تَوَلَّىٰ وَكَفَرَ (٢٣) | हां! जो मनुष्य तोंड फिरवील आणि कुफ्र करील. (२३) |
| فَيُعَذِّبُهُ اللَّهُ الْعَذَابَ الْأَكْبَرَ (٢٤) | त्याला अल्लाहतआला फार मोठी शिक्षा देईल. [7] (२४) |
| إِنَّ إِلَيْنَا إِيَابَهُمْ (٢٥) | नि:संशय आमच्याचकडे त्यांना परतून येणे आहे. (२५) |

१) ही स्वर्गवाल्यांची चर्चा आहे. जे नर्कवासियांच्या उलट फारच सुखी संपन्न, आणि सर्व प्रकारच्या सोयी सवलतींनी संपन्न असतील. 'ऐन्' एक वर्ग आहे. म्हणजे अनेक झरे असतील. 'नमारिक' वसाईदच्या अर्थात (तक्के-लोड) आहे. 'जराब्बी' मसनदे जाजम, गालिचे, बिछाने, 'मबसुसा' पसरलेली म्हणजे हे गालीचे जाग जागी अंथरलेले असतील. स्वर्गवासी जेथे आराम करू इच्छतील, करू शकतील.

२) उंट अरबस्तानात सार्वत्रिक होते. आणि अरबांची स्वारी तेच होते. म्हणून अल्लाहने त्यांचा उल्लेख करून फर्माविले की, याच्या निर्मितीवर मनन करा. अल्लाहने त्याला किती मोठे अस्तित्व बहाल केले. आणि किती शक्ती आणि सामर्थ्य त्यांच्यात ठेवले. असे असून सुद्धा तो तुमच्याकरीता नम्र आणि तुमच्या आधिन आहे. तुम्ही त्याच्यावर जितके इच्छाल, तेवढे ओझे लादून द्या. तो इन्कार करणार नाही. तुमच्या अधिनस्त होऊन राहील. याशिवाय त्याचे मांस तुमच्या खाण्यासाठी, त्याचे दूध तुमच्या पिण्यासाठी, आणि त्याची लोकर, उब मिळविण्याकरीता कामास येते.

३) म्हणजे आकाश किती उंचीवर आहे? तरीसुद्धा खांबाशिवाय ते उभे आहे. त्याच्यात कोणी तडा आणि वक्रतापण नाही. त्याशिवाय आम्ही त्याला नक्षत्रांनी सुशोभित करून दिले आहे.

४) म्हणजे कशाप्रकारे त्यांना जमिनीत मेखांप्रमाणे गाडून देण्यांत आले आहे. की जेणेकरून जमीन हालणार नाही. त्याशिवाय त्यांच्यात जी खनिजे आणि दुसरे फायदे आहेत, ते याच्याशिवाय आहेत.

५) म्हणजे कशाप्रकारे तिला सपाट करून माणसाच्या रहाण्यासाठी योग्य बनविले आहे. तो इच्यावर चालतो फिरतो, कारभार करतो आणि आकाशाला भिडणाऱ्या उत्तुंग इमारती बनवतो.

६) म्हणजे आपले काम फक्त उपदेश करणे, प्रचार आणि आवाहनाचे आहे. याच्याशिवाय आणि याच्यापेक्षांजास्त नाही.

७) म्हणजे नरकाग्नीची कायमची शिक्षा.

ثُمَّ إِنَّ عَلَيْنَا حِسَابَهُم ﴿٢٦﴾

मग नि:संशय तद्नंतर त्यांचा हिशेब घेणे आमचेच काम आहे.[१] (२६)

آياتها ٣٠ (٨٩) سُورَةُ الْفَجْرِ مَكِّيَّةٌ (١٠) رُكُوعُهَا ١

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

## (८९) सू. अल-फज्र

महावाक्ये ३० | रुकूअ १

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

وَالْفَجْرِ ﴿١﴾

शपथ आहे सकाळची[२] (१)

وَلَيَالٍ عَشْرٍ ﴿٢﴾

आणि दहा रात्रींची[३] (२)

وَالشَّفْعِ وَالْوَتْرِ ﴿٣﴾

आणि सम आणि विषमची[४] (३)

وَاللَّيْلِ إِذَا يَسْرِ ﴿٤﴾

आणि रात्रीची जेव्हा ती चालू लागेल.[५] (४)

هَلْ فِي ذَٰلِكَ قَسَمٌ لِّذِي حِجْرٍ ﴿٥﴾

काय याच्यांत बुद्धीवंतासाठी पुरेशा शपथा नाहीत?[६] (५)

أَلَمْ تَرَ كَيْفَ فَعَلَ رَبُّكَ بِعَادٍ ﴿٦﴾

काय आपण पाहिले नाही की, तुमच्या पालनकर्त्याने 'आद' बरोबर काय केले?[७] (६)

إِرَمَ ذَاتِ الْعِمَادِ ﴿٧﴾

स्तंभावाले इरमचे बरोबर[८] (७)

الَّتِي لَمْ يُخْلَقْ مِثْلُهَا فِي الْبِلَادِ ﴿٨﴾

त्यांच्यासारखे (लोक) दुसऱ्या कोण्या शहरांत आणि देशांत पैदा केले गेले नाहीत.[९] (८)

وَثَمُودَ الَّذِينَ جَابُوا الصَّخْرَ بِالْوَادِ ﴿٩﴾

आणि 'समूद' बरोबर ज्यांनी वादीमध्ये मोठे मोठे दगड कोरून टाकले होते.[१०] (९)

وَفِرْعَوْنَ ذِي الْأَوْتَادِ ﴿١٠﴾

आणि फिरऔन बरोबर जो मेखांवाला होता.[११] (१०)

الَّذِينَ طَغَوْا فِي الْبِلَادِ ﴿١١﴾

या सर्वांनी शहरांत डोके उचलले होते. (११)

فَأَكْثَرُوا فِيهَا الْفَسَادَ ﴿١٢﴾

आणि फारच फिसाद मचवून ठेवला होता. (१२)

فَصَبَّ عَلَيْهِمْ رَبُّكَ سَوْطَ عَذَابٍ ﴿١٣﴾

शेवटी तुझ्या पालनकर्त्याने, या सर्वांवर शिक्षेचा आसूड उगारला[१२] (१३)

إِنَّ رَبَّكَ لَبِالْمِرْصَادِ ﴿١٤﴾

खचित्‌च तुझा पालनकर्ता पाळतीत आहे.[१३] (१४)

فَأَمَّا الْإِنسَانُ إِذَا مَا ابْتَلَاهُ رَبُّهُ فَأَكْرَمَهُ وَنَعَّمَهُ فَيَقُولُ رَبِّي أَكْرَمَنِ ﴿١٥﴾

मनुष्याची (अशी स्थिती आहे की,) जेव्हा त्याचा पालनकर्ता त्याची कसोटी घेतो आणि मानपान आणि सुख देतो, तेव्हा तो म्हणू लागतो की, माझ्या पालनकर्त्याने[१४] मला प्रतिष्ठित बनवले. (१५)

وَأَمَّا إِذَا مَا ابْتَلَاهُ فَقَدَرَ عَلَيْهِ رِزْقَهُ فَيَقُولُ رَبِّي أَهَانَنِ ﴿١٦﴾

आणि जेव्हा तो त्याची परीक्षा घेत त्याच्या अन्न संपत्तीची टंचाई करून देतो. तर तो म्हणू लागतो की, माझ्या पालनकर्त्याने मला तुच्छ लेखले.[१५] (१६)

१) मशहूर आहे की, याच्या उत्तरांत 'अल्लाहुम्मा हासिबना हिसाबय् यसीरा म्हटले जावे. ही दुआ तर नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमकडून सिद्ध आहे. जे आपण आपल्या काही नमाजीमध्ये पढत असत. जसे की, सू.इनशिकाक मध्ये येऊन चुकले. परंतु त्याच्या उत्तरांत पढणे आपण ﷺ कडून सिद्ध नाही.

२) याच्याने अभिप्रेत सर्व साधारण सकाळ आहे. कोण्या खास दिवसाची सकाळ नाही.

३) याच्याने बहुतेक भाष्यकारांजवळ जिल्‌हज्जाच्या पहिल्या दहा रात्री आहेत. ज्यांचे महात्म्य हदीर्शींनी सिद्ध आहे. नबी ﷺ नी फर्माविले, ''जिलहज्जाच्या पहिल्या दशकांत केलेली सुकृत्ये, अल्लाहला सर्वांत जास्त प्रिय आहेत. येथ

पावेतो की, अल्लाहच्या मार्गात जिहाद पण इतके आवडते नाही; शिवाय त्या जिहादच्या ज्यांत मनुष्य शहिदच होऊन जावा.'' (अल्बुखारी)

४) याच्याने अभिप्रेत विषम आणि सम संख्या आहेत. किंवा त्या संख्या, ज्या विषम आणि सम असतात. काही म्हणतात की हे वास्तविक सृष्टीचे प्रकार आहेत. यासाठी की सृष्टी सम (जोडी) किंवा विषम (एक) आहे; याच्या शिवाय नाही. (अयसरुत तफासीर)

५) म्हणजे जेव्हा येतील आणि जेव्हा जातील. कारण की 'सैर' (चालणे) येणे जाणे दोन्ही स्वरूपांत होते.

६) 'जालिका' ने चर्चित शपथ वाहिलेल्या वस्तूकडे इशारा आहे की, काय यांच्या शपथा बुद्धीवंतांसाठी पुरेशा नाहीत? 'हिज्र' चा अर्थ होतो मना करणे, मानवांच्या सद्सद्विवेक बुद्ध्या सुद्धा त्या मानवाला चुकीच्या कामापासून मना करतात. म्हणून बुद्धीला सुद्धा 'हिज्र' म्हणण्यात येते. याच्याने उद्देश्य मक्केवाल्यांना तंबी करणे आहे. की जर तुम्ही आमच्या पैगंबरांना खोटे ठरवण्यापासून माघार घेतली नाही. तर तूमचीपण अशाच प्रकारे पकड होऊ शकते; जशी मागील लोक समूहांची अल्लाहतआलाने केली.

७) यांच्याकडे ह.हूद عليه السلام पैगंबर बनवून पाठविले गेले होते. त्यांनी त्यांना खोटे ठरवले. सरशेवटी अल्लाहतआलाने सोसाट्याच्या वाऱ्याची शिक्षा, त्यांच्यावर अवतीर्ण केली; जो सतत सात रात्री आठ दिवस त्यांच्यावर चालू राहिला (सू.अल् हाक्का-७ ते १०) आणि त्यांना नष्ट करून टाकले.

८) 'इरम' हे आदच्या लोकांच्या आजोबाचे नांव आहे. यांच्या वंशाची शृंखला, आद् बिन औस बिन इरम बिन साम बिन नूह (फत्हुल कदीर) याचा उद्देश्य हा खुलासा आहे की, हे पहिले 'आद्' आहेत. 'जातिल् इमाद' (स्तंभ वाले) ने इशारा आहे त्यांच्या शक्ती आणि सामर्थ्य आणि उंच अंगकाठीकडे.

याशिवाय ते बांधकामाच्या कलेत सुद्धा मोठे कौशल्य बाळगत होते. आणि फारच मजबुत पायांवर, आलीशान इमारत उभारत असत. 'जातिल इमाद' मध्ये दोन्हीही भावार्थ शामील असू शकतात.

९) म्हणजे यांच्यासारखे उंच बांध्यांचे आणि शक्ती सामर्थ्यवाले लोक आणखी पैदा झाले नाहीत. हे लोक म्हणत असत, ''आमच्यापेक्षा कोण जास्त शक्तीमान आहे?'' (सू.हाम-मीम-सिजदः-१५)

१०) हे ह.सॉलेह عليه السلام चे लोक आहेत. अल्लाहने त्यांना दगड कोरण्याचे खास कौशल्य आणि शक्ती बहाल केली होती. येथपावेतो की हे लोक पर्वतांना कोरून त्यांत राहण्याच्या जागा बनवून घेत. जसे की, कुरआनाने म्हटले आहे. ''आणि तुम्ही पर्वतांना कोरून ऐसपैस घरे बनवीत आहांत.'' (सू.शुअरा-१४९)

११) याचा अर्थ हा आहे की, तो मोठ्या सैन्यवाला होता. ज्याच्याजवळ भरपूर तंबू होते, ज्यांना मेखा गाडून उभे केले जात असे. किंवा याच्याने त्याच्या जुलूम अत्त्याचाराकडे इशारा आहे की, मेखामार्फत तो लोकांना शिक्षा देत असे. (फत्हुल कदीर)

१२) म्हणजे यांच्यावर आकाशांतून शिक्षा अवतीर्ण करून, त्यांना नष्ट किंवा धडा घेण्यासारख्या परिणामांत व्यस्त करून टाकले.

१३) म्हणजे तमाम सृष्टीची कर्मे पाहत आहेत. आणि त्याच्याप्रमाणे तो इहलोक व परलोकांमध्ये (त्यांचा) मोबदला देतो.

१४) म्हणजे जेव्हा अल्लाह कोणाला अन्नसंपत्ती आणि धनसंपत्तीची विपुलता प्रदान करतो, तर तो आपल्या बाबतीत चुकीच्या समजुतीचा बळी होऊन जातो की, अल्लाह याच्यावर फार मेहेरबान आहे. वास्तविक ही विपुलता, परीक्षा आणि कसोटी म्हणून असते.

१५) म्हणजे तो तंगदस्तीत व्यस्त करून आजमावितो; तर अल्लाहच्या बाबतीत बदगुमानी जाहीर करतो.

كَلَّا بَلْ لَّا تُكْرِمُوْنَ الْيَتِيْمَ ﴿١٧﴾
असे मुळीच नाही? (१) किंबहुना (गोष्ट ही आहे की,) तुम्ही लोक अनाथांचा आदर करीत नाही. (२) ⑰

وَلَا تَحٰٓضُّوْنَ عَلٰى طَعَامِ الْمِسْكِيْنِ ﴿١٨﴾
आणि गरीब मोतादांस जेऊ घालण्याचे दुसऱ्यांस उत्तेजन देत नाही ⑱

وَتَاْكُلُوْنَ التُّرَاثَ اَكْلًا لَّمًّا ﴿١٩﴾
आणि (मेलेल्यांचा) वारसा साराचा सारा खाऊन चट करीतात. (३) ⑲

وَّتُحِبُّوْنَ الْمَالَ حُبًّا جَمًّا ﴿٢٠﴾
आणि द्रव्याला मनमुराद प्रिय ठेवतात. (४) ⑳

كَلَّآ اِذَا دُكَّتِ الْاَرْضُ دَكًّا دَكًّا ﴿٢١﴾
खचित्च ज्यावेळी (५) पृथ्वी बरोबर सपाट करून अंथरून दिली जाईल ㉑

وَّجَآءَ رَبُّكَ وَالْمَلَكُ صَفًّا صَفًّا ﴿٢٢﴾
आणि तुझा पालनकर्ता (स्वत:) येऊन विराजमान होईल; आणि देवदूत रांगा बांधून उभे राहतील. (६) ㉒

وَجِايْٓءَ يَوْمَئِذٍ بِجَهَنَّمَ ۙ يَوْمَئِذٍ يَّتَذَكَّرُ الْاِنْسَانُ وَاَنّٰى لَهُ الذِّكْرٰى ﴿٢٣﴾
आणि ज्या दिवशी नरकाग्नी सुद्धा आणला जाईल; (७) त्या दिवशी मनुष्य बोध घेईल. परंतु आज बोध घेण्याचा फायदा काय? (८) ㉓

يَقُوْلُ يٰلَيْتَنِيْ قَدَّمْتُ لِحَيَاتِيْ ﴿٢٤﴾
तो म्हणेल की अरेरे! की मी या जीवनासाठी काही सुकृत्ये पहिलेच करून ठेवली असती! (९) ㉔

فَيَوْمَئِذٍ لَّا يُعَذِّبُ عَذَابَهٗٓ اَحَدٌ ﴿٢٥﴾
तर आज अल्लाहच्या शिक्षांसारखी शिक्षा कोणाची नसेल. ㉕

وَّلَا يُوْثِقُ وَثَاقَهٗٓ اَحَدٌ ﴿٢٦﴾
न त्याच्या जखडण्यासारखे जखडणे असेल. (१०) ㉖

يٰٓاَيَّتُهَا النَّفْسُ الْمُطْمَئِنَّةُ ﴿٢٧﴾
हे शांती पावणाऱ्या आत्म्या ! ㉗

ارْجِعِيْٓ اِلٰى رَبِّكِ رَاضِيَةً مَّرْضِيَّةً ﴿٢٨﴾
तू आपल्या पालनकर्त्याकडे परतून चल! (११) की तू त्याच्याशी राजी (आणि) तो तुझ्याशी खुश ㉘

فَادْخُلِيْ فِيْ عِبٰدِيْ ﴿٢٩﴾
तर माझ्या खास सेवकांत जाऊन दाखल हो! ㉙

وَادْخُلِيْ جَنَّتِيْ ﴿٣٠﴾
आणि माझ्या स्वर्गांत चालला जा! ㉚

## (९०) सू. अल-बलद

महावाक्ये २० | रुकूअ १

(٩٠) سُوْرَةُ الْبَلَدِ مَكِّيَّةٌ (٣٥) | اٰيَاتُهَا ٢٠ | رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावानें मी आरंभ करतो

لَآ اُقْسِمُ بِهٰذَا الْبَلَدِ ﴿١﴾
मी या शहराची शपथ वहातो. (१२) ①

وَاَنْتَ حِلٌّۢ بِهٰذَا الْبَلَدِ ﴿٢﴾
आणि तुझ्यासाठी या शहरांत युद्ध हलाल (विहीत) होणार आहे. (१३) ②

وَوَالِدٍ وَّمَا وَلَدَ ﴿٣﴾
आणि शपथ आहे मानवी बाप आणि त्याच्या संततीची (१४) ③

لَقَدْ خَلَقْنَا الْاِنْسَانَ فِيْ كَبَدٍ ﴿٤﴾
खचित्च आम्ही मनुष्याला (मोठ्या) कष्टांत निर्माण केले आहे. (१५) ④

اَيَحْسَبُ اَنْ لَّنْ يَّقْدِرَ عَلَيْهِ اَحَدٌ ﴿٥﴾
काय हा कल्पना करीतो की, तो कोणाच्या वर्चस्वातंच नाही? (१६) ⑤

१) म्हणजे गोष्ट अशी नाही, जसे लोक समजतात. अल्लाहतआला धनद्रव्य आपल्या प्रिय सेवकांना पण देतो. आणि नावडत्यांनापण. तंगदस्तीमध्ये सुद्धा तो आपल्या आणि परक्यांना, उभयतांना व्यस्त करीतो. खरी मदार दोन्ही अवस्थांमध्ये अल्लाहच्या आज्ञापालनावर आहे. जेव्हा अल्लाह धन देईल तेव्हा अल्लाहचे आभार मानावेत. तंगी आली तर धैर्याने काम घ्यावे.

२) म्हणजे त्यांच्या बरोबर ते चांगली वागणुक करीत नाही, ज्याला ते पात्र आहेत. नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे फर्मान आहे, ''ते घर सर्वांत उत्तम आहे, ज्याच्यांत अनाथा बरोबर चांगली वागणुक केली जाईल. आणि ते घर फारच वाईट आहे, ज्यांत त्याच्या बरोबर वाईट वर्तणुक केली जाईल. मग आपल्या बोटाने इशारा करून सांगितले मी आणि अनाथांचा कैवार घेणारा स्वर्गांत, अशा प्रकारे बरोबर बरोबर असतील, जशी ही दोन बोटे मिळालेली आहेत.'' (अबु

दाऊद)
३) म्हणजे ज्या पद्धतीने सुद्धा प्राप्त व्हावा, हलाल पद्धतीने किंवा हराम पद्धतीने.
४) 'जम्मा' कसिरा च्या अर्थांत म्हणजे खूप.
५) किंवा तुमचे कर्म असे व्हावयास नको, जे चर्चा केले गेले. कारण की, एक वेळ येणार आहे जेव्हा.............
६) असे म्हणतात की जेव्हा देवदूत कयामतच्या दिवशी, आकाशांतून खाली उतरतील तेव्हा प्रत्येक आकाशातील देवदुतांची एक वेगळी रांग होईल. अशा प्रकारे सात रांगा होतील. ज्या जमिनीला घेरून घेतील.
७) सत्तर हजार लगामांनी नरकाग्नी जकडलेला असेल. आणि प्रत्येक लगामी सोबत सत्तर हजार देवदूत असतील. जे तिला ओढत असतील. (स.मुस्लिम) त्याला महासिंहासनाच्या डाव्या बाजूला उभे करून दिले जाईल. तेव्हा त्याला पाहून, सर्व सामिप्य प्राप्त देवदूत आणि पैगंबर लोक गुडघे टेकून पडून जातील आणि ''या रब ! नफ्सी नफ्सी'' म्हणून ओरडून पडतील. (फत्हुल कदीर)
८) म्हणजे हे भयानक दृष्य पाहून, माणसाचे डोळे उघडतील, आणि आपल्या कुफ्र आणि गुन्ह्यांमुळे पश्चात्ताप पावेल. परंतु त्या दिवशी त्याचे पश्चात्ताप पावणे आणि बोध घेणे काहीही फायदेकारक होणार नाही.
९) हे खेद आणि दु:ख जाहीर करणे, त्याच पश्चात्तापाचा एक भाग आहे. जो त्या दिवशी फायदेकारक होणार नाही.
१०) यासाठी की त्या दिवशी सर्व अधिकार फक्त एका अल्लाहकडे असतील. दुसऱ्या कोणाला त्याच्यासमोर मत प्रदर्शन करता येणार नाही; येथ पावेतो की, त्याच्या परवानगीशिवाय कोणी कोणाची शिफारस सुद्धा करू शकणार नाही. अशा स्थितीत काफिरांना जी शिक्षा होईल, आणि ज्या प्रमाणे ते त्याच्या बंधनांत जखडलेले असतील, त्याची येथे कल्पना पण करवत नाही. हे शक्य आहे की त्याचा काही अंदाज असेल. परंतु ईमानवाले आणि आज्ञाधारक याची स्थिती याच्यापेक्षा बिल्कुल निराळी असेल; जसे की पुढील महावाक्यांत आहे.
११) म्हणजे त्याचा मोबदला आणि पुण्यप्रतिफळ आणि देणग्यांकडे, ज्या त्याने आपल्या सेवकांकरीता स्वर्गांत तयार केल्या आहेत. काही म्हणतात की, कयामतच्या दिवशी म्हटले जाईल. काही म्हणतात की, मृत्यूच्या वेळी देवदूत शुभवर्तमान देतात. अशाच प्रकारे कयामतच्या दिवशी पण त्याला हे सांगितले जाईल जे येथे मजकुर आहे. हाफिजे इब्ने कसीर ने इब्ने असाकिरच्या हवाल्याने नोंद केली आहे की, नबी करीम सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी ही दुआ पढण्याचा हुकूम दिला, ''अल्लाहुम्म इन्नी अस अलुका, नफ्सन बेका मुतमईन्नतन तुअमिनु बि लिकाइका व तरजा बिकजाइक व तकनअ बि अताईका (इब्ने कसीर) हे अल्लाह मी तुझ्याकडून अशा आत्म्याची (नफ्स) मागणी करतो जो तुझ्याबरोबर संतुष्ट असेल. तुझ्या भेटीवर विश्वास करेल. तुझ्या निर्णयावर राजी असेल आणि तुझ्या देणग्यावर संतुष्ट असेल.
१२) याच्याने अभिप्रेत मक्का मुकर्रमा आहे. ज्यांत या वेळी, जेव्हा या अध्यायाचे अवतरण झाले, नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचा मुक्काम होता. आपण ﷺ चे जन्म स्थळ पण हेच शहर होते. म्हणजे अल्लाहने आपण ﷺ च्या जन्मस्थळाची आणि रहाण्याच्या ठिकाणाची शपथ वाहिली. ज्यामुळे याच्या मोठेपणाचा आणखी खुलासा होतो.
१३) हा इशारा आहे, त्या वेळेकडे, जेव्हा मक्केवर विजय मिळाला. यावेळी अल्लाहने नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमकरीता या सन्माननीय शहरांत युद्धाला हलाल करून दिले होते; जेव्हा की याच्यांत लढाईची परवानगी नाही. म्हणून हदीस आहे, ''नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमनी फर्माविले, या शहराला अल्लाहने त्या वेळेपासून सन्माननीय बनविले आहे, जेव्हा त्याने आकाश आणि पृथ्वीला निर्माण केले. तर हे अल्लाहने ठरविलेल्या सन्मानाने कयामतपर्यंत हराम आहे. न त्याचे झाड तोडले जावे न त्यांचे काटे उपटले जावेत. माझ्याकरीता त्याला दिवसाच्या एका घटके पुरते हलाल केले गेले होते; आणि आज त्याचे सन्माननीय होणे पुन्हा असेच परतून आले आहे जसे काल होते..... जर कोणी येथे युद्धा करीतां, पुरावा म्हणून माझ्या युद्धाला पुढे करेल, तर त्याला सांगा की, अल्लाहच्या पैगंबराला याची परवानगी अल्लाहने दिली होती परंतु तुम्हांस त्याने ही परवानगी दिली नाही.'' (स.बुखारी)
१४) काहींनी याच्याने अभिप्रेत ह.आदम عليه السلام आणि त्यांची संतती घेतली आहे. आणि काहींजवळ हे सर्व साधारण आहे. प्रत्येक बाप आणि त्याची संतती, याच्यांत शामील आहे.
१५) म्हणजे याचे जीवन काबाड कष्ट आणि परिश्रमाने भरपूर आहे. ईमाम तबरी ने या भावार्थाला अंगीकारले आहे. हे शपथेचे उत्तर आहे.
१६) म्हणजे कोणी त्याची पकड करण्यावर समर्थ नाही.

يَقُوْلُ اَهْلَكْتُ مَالًا لُّبَدًا ۝٦
सांगत फिरतो की मी पुष्कळसे द्रव्य उधळून टाकले.[(१)] ६

اَيَحْسَبُ اَنْ لَّمْ يَرَهٗٓ اَحَدٌ ۝٧
काय तो (असे) समजतो की, त्याला कोणी पाहिलेच नाही?[(२)] ७

اَلَمْ نَجْعَلْ لَّهٗ عَيْنَيْنِ ۝٨
काय आम्ही त्याचे दोन डोळे बनविले नाहीत?[(३)] ८

وَلِسَانًا وَّشَفَتَيْنِ ۝٩
आणि जीभ आणि ओंठ (बनविले नाहीत?)[(४)] ९

وَهَدَيْنٰهُ النَّجْدَيْنِ ۝١٠
आणि आम्ही दोन्ही मार्ग दाखवून दिले.[(५)] १०

فَلَا اقْتَحَمَ الْعَقَبَةَ ۝١١
तरीही त्याच्याने होऊ शकले नाही की, घाटीत प्रवेश करता.[(६)] ११

وَمَآ اَدْرٰىكَ مَا الْعَقَبَةُ ۝١٢
आणि तू काय समजलास की घाटी आहे तरी काय? १२

فَكُّ رَقَبَةٍ ۝١٣
एखाद्याच्या मानेला (दास, दासीला) स्वतंत्र करणे १३

اَوْ اِطْعٰمٌ فِيْ يَوْمٍ ذِيْ مَسْغَبَةٍ ۝١٤
किंवा भुकेच्या दिवशी जेऊं घालणे. १४

يَّتِيْمًا ذَا مَقْرَبَةٍ ۝١٥
कोण्या नातेवाईक अनाथाला १५

اَوْ مِسْكِيْنًا ذَا مَتْرَبَةٍ ۝١٦
किंवा धुळीत पडलेल्या गरीब मोतादला.[(७)] १६

१) 'लुबदा' भरपूर, ढीगभर. म्हणजे जगाचे मामले आणि निरर्थक गोष्टीत खूब पैसे उडवितो. मग गर्वाने लोकांना सांगत फिरतो.
२) अशा प्रकारे अल्लाहच्या आज्ञाभंजनांत द्रव्य खर्च करतो, आणि समजतो त्याला कोणी पाहणार नाही? वास्तविक अल्लाह सर्व काही पहात आहे. ज्यावर तो त्याला मोबदला देईल. पुढे अल्लाहतआला आपल्या काही बक्षीसांची चर्चा करीत आहे. जेणे करून अशा लोकांनी बोध घ्यावा.
३) ज्याने तो पाहतो.
४) जिभेने तो बोलतो आणि जे मनांत आहे त्याला जाहीर करतो. ओठांपासून तो बोलण्याला आणि खाण्याला मदत मिळवितो. याशिवाय ते त्याच्या चेहऱ्याला तोंडाच्या सौंदर्याला पण कारणीभूत आहेत.
५) म्हणजे भल्याचे सुद्धा आणि वाईटाचे सुद्धा, कुफ्रचे सुद्धा आणि ईमानाचे सुद्धा, सुदैवाचे सुद्धा आणि दुर्दैवाचे सुद्धा. फर्माविले, ''आम्ही त्याला मार्ग दाखविला तर मग आता त्याने कृतज्ञ बनावे किंवा कृतघ्न बनावे.'' (सू.दहर-३)
६) 'अकबा' घाटीला म्हणतात, म्हणजे रस्ता जो पर्वतांत असतो. सर्व साधारणपणे याच्यातून पार होणे कठीण असते. हे वाक्य येथे प्रश्नार्थक, नकाराच्या भावार्थात आहे. म्हणजे काय तो घाटीत दाखल झाला नाही ? अर्थ आहे झाला नाही हा एक दृष्टांत आहे. त्या काबाडकष्टाच्या खुलाशासाठी, जो पुण्याच्या कामाकरीता एका मनुष्याला शैतानाने वसवसे आणि मनोकामनेचे वासनांचे तगादे, यांच्या विरुद्ध करावे लागते. जसे घाटीत चढण्यासाठी फार परिश्रमांची आवश्यकता असते. (फत्हुल कदीर)
७) 'मस्गब:' भुकेच्या दिवशी. 'जामतरब:' (मातीवाला) म्हणजे जो दारिद्रय आणि गरीबीमुळे माती (जमीनी) वर पडलेला असेल. त्याचे घरदार पण नसावे. अर्थ हा आहे की, कोण्या मानेला मुक्त करून देणे. कोण्या भुकेल्याला नातेवाईक, अनाथाला किंवा गरीब मोतादाला जेऊ घालणे. हे पसार होण्याला कठीण असलेल्या घाटीत दाखल होण्यासारखे आहे. ज्याच्या मार्फत मनुष्य नरकाग्नीपासून वांचून, स्वर्गांत जाऊन पोहोचेल. अनाथांची मदत करणे तसे पण फार पुण्याचे काम आहे. पण जर तो नातेवाईक सुद्धाअसेल तर त्याच्या मदतीचा मोबदला सुद्धा दुप्पट आहे. एक दानधर्माचा, दुसरा सिला रहमीचा अशाच प्रकारे गुलामाला मुक्त करून देण्याचे सुद्धा मोठे महात्म्य हदीशींमध्ये आले आहे. आजकाल याचे स्वरुप कोण्या कर्जबाजारी माणसाला, कर्जाच्या ओझ्यापासून मुक्त करून देणे, होऊ शकते. हे पण एक प्रकारे कोण्या 'मानेला मुक्त करून देणेच आहे.

ثُمَّ كَانَ مِنَ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَتَوَاصَوْا بِالصَّبْرِ وَتَوَاصَوْا بِالْمَرْحَمَةِ ﴿١٧﴾

मग त्या लोकांमधून होऊन गेला असता, जे ईमान आणतात[१] आणि एक दुसऱ्याला सहनशिलतेची, आणि दया करण्याची ताकीद करतात.[२] (१७)

اُولٰٓئِكَ اَصْحٰبُ الْمَيْمَنَةِ ﴿١٨﴾

हेच ते लोक आहेत, उजव्या हातावाले (ज्यांच्या उजव्या हातांत कर्मपत्रे दिली जाणार आहेत) (१८)

وَالَّذِيْنَ كَفَرُوْا بِاٰيٰتِنَا هُمْ اَصْحٰبُ الْمَشْئَمَةِ ﴿١٩﴾

आणि ज्या लोकांनी आमच्या महावाक्यांस नाकारले, हे ते लोक आहेत, डाव्या हातावाले (ज्यांच्या डाव्या हातांत कर्म पत्रे दिली जाणार आहेत) (१९)

१ ع २० १५ عَلَيْهِمْ نَارٌ مُّؤْصَدَةٌ ﴿٢٠﴾ ع ٢٠ ١٥ ١

त्यांच्यावरच आग असेल जी चोहोंकडून घेरलेली असेल.[३] (२०)

## (९१) सू. शम्स

महावाक्ये १५ | रुकूअ १

(٩١) سُوْرَةُ الشَّمْسِ مَكِّيَّةٌ (٢٦) | اٰيَاتُهَا ١٥ | رُكُوْعُهَا ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَالشَّمْسِ وَضُحٰىهَا ﴿١﴾

शपथ आहे सूर्याची आणि त्याच्या उन्हाची![४] (१)

وَالْقَمَرِ اِذَا تَلٰىهَا ﴿٢﴾

शपथ आहे चंद्राची, जेव्हा याच्यामागे येईल.[५] (२)

وَالنَّهَارِ اِذَا جَلّٰىهَا ﴿٣﴾

शपथ आहे दिवसाची, जेव्हा सूर्यास प्रकट करतो.[६] (३)

وَالَّيْلِ اِذَا يَغْشٰىهَا ﴿٤﴾

शपथ आहे रात्रीची, जेव्हा त्याला लपवून टाकते.[७] (४)

وَالسَّمَآءِ وَمَا بَنٰىهَا ﴿٥﴾

शपथ आहे आकाशाची आणि त्याच्या बनविण्याची[८] (५)

وَالْاَرْضِ وَمَا طَحٰىهَا ﴿٦﴾

शपथ आहे जमिनीची आणि तिला सपाट करण्याची[९] (६)

وَنَفْسٍ وَّمَا سَوّٰىهَا ﴿٧﴾

शपथ आहे जिवाची आणि त्याला दुरुस्त बनविण्याची[१०] (७)

فَاَلْهَمَهَا فُجُوْرَهَا وَتَقْوٰىهَا ﴿٨﴾

मग त्याला सुबुद्धि दिली वाईटाची आणि वाचून चालण्याची[११] (८)

१) याच्याने ठाऊक झाले की, चर्चीत भलाईची कामे, त्याचवेळी फायदेकारक, आणि पारलौकीक सद्भाग्याला कारणीभूत होतील, जेव्हा यांचा करणारा ईमानवाला असेल.

२) ईमानवाल्यांचे हे वैशिष्टय आहे की, ते एक दुसऱ्यांना सहनशिलतेची आणि दयेची ताकीद करतात.

३) 'मुसद:' चा अर्थ म्हणजे त्यांना आगीत टाकून चोहोकडून बंद करून देण्यात येईल. यासाठी की त्यांना आगीची पूर्ण तिव्रता आणि उष्णता पोहचावी दुसरे त्यांनी पळून कोठे जाऊ शकू नये.

४) किंवा त्याच्या प्रकाशाची किंवा अर्थ 'जुहा' ने दिवस आहे. म्हणजे सूर्याची आणि दिवसाची शपथ.

५) म्हणजे जेव्हा सूर्य अस्त झाल्यानंतर, त्याचा उदय व्हावा. जसे की पहिल्या अर्ध्या महिन्यांत असे होते.

६) किंवा अंध:काराला दूर करावे; अंधाराचा तर पहिले उल्लेख नाही, परंतु संदर्भ याच्यावर प्रामाण्य करतो. (फत्हुल कदीर)

७) म्हणजे सूर्याला झांकून घ्यावे. आणि चोहोंकडे अंधार पसरून जावा.

८) किंवा त्या व्यक्तीत्वाचे, ज्याने त्याला बनविले.

९) किंवा ज्याने त्याला सपाट बनविले.

१०) किंवा ज्याने त्याला ठीक ठाक बनविले. ठीक ठाक करण्याचा अर्थ आहे, योग्य असा अवयववाला बनविला.

११) इल्हामचा अर्थ एक तर हा आहे की, त्यांना चांगल्या प्रकारे समजाऊन दिले आणि त्यांना पैगंबर (अलैहिस सलाम) आणि आकाशी पुस्तकांच्या मार्फत चांगल्या आणि वाईटाची ओळख करवून दिली किंवा अर्थ आहे की त्यांच्या बुद्धीत आणि स्वभावांत, चांगले आणि वाईट, पाप आणि पुण्य, यांची जाणीव आणि कल्पना करून दिली. जेणे करून त्यांनी पुण्याला अंगीकारावे आणि पापापासून वांचावे.

ज्याने त्याला शुचिर्भुत केले, तो सफल झाला.(१) ⑨ | قَدْ أَفْلَحَ مَن زَكَّىٰهَا ﴿٩﴾

आणि ज्याने त्याला दाबून टाकले तो असफल झाला.(२) ⑩ | وَقَدْ خَابَ مَن دَسَّىٰهَا ﴿١٠﴾

'समूद' ने आपल्या शिरजोरीमुळे खोटे ठरवले.(३) ⑪ | كَذَّبَتْ ثَمُودُ بِطَغْوَىٰهَآ ﴿١١﴾

जेव्हा त्यांच्यातील मोठा दुर्दैवी उठून उभा राहिला.(४) ⑫ | إِذِ ٱنۢبَعَثَ أَشْقَىٰهَا ﴿١٢﴾

त्यांना अल्लाहच्या पैगंबराने सांगून टाकले होते की, अल्लाहतआलाची उंटीण, आणि तिच्या पिण्याच्या पाळीला (सांभाळा).(५) ⑬ | فَقَالَ لَهُمْ رَسُولُ ٱللَّهِ نَاقَةَ ٱللَّهِ وَسُقْيَٰهَا ﴿١٣﴾

या लोकांनी आपल्या पैगंबराला खोटे समजून, त्या उंटीणीच्या घोडशिरा कापून टाकल्या;(६) तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्या पापांमुळे त्यांचा नाश केला;(७) आणि मग सर्वांना नष्ट करून, त्या वस्तीला बर्बाद करून टाकले.(८) ⑭ | فَكَذَّبُوهُ فَعَقَرُوهَا فَدَمْدَمَ عَلَيْهِمْ رَبُّهُم بِذَنۢبِهِمْ فَسَوَّىٰهَا ﴿١٤﴾

तो या शिक्षेच्या परिणामापासून भित नाही.(९) ⑮ | وَلَا يَخَافُ عُقْبَٰهَا ﴿١٥﴾

१) शिर्कपासून, पापापासून आणि चारित्र्य विषयक दुर्गुणांपासून त्यांना पवित्र केले. मग पारलौकीक सफलता त्याला प्राप्त होईल.

२) म्हणजे त्याने त्याला बहकवून टाकले. तो तोट्यांत राहिला. 'दस्स' 'तदसीस' पासून आहे. ज्याचा अर्थ आहे, एका वस्तूला दुसऱ्या वस्तूंत लपवून देणे. 'दस्साहा' चा अर्थ होईल ज्याने आपल्या जिवाला लपवून दिले. आणि त्याला बेकार सोडून दिले. आणि त्याला अल्लाहचे आज्ञापालन आणि चांगल्या कामांशी जोडले नाही.

३) 'तुगयान' ती शिरजोरी जी मर्यादेच्या पलीकडे जाईल. याच शिरजोरीने त्यांना खोटे म्हणण्यावर उभारले.

४) ज्याचे नांव भाष्यकार कदार बिन सालिफ सांगतात. त्याने असे काम केले की, तो दुर्भाग्यवंताचा सरदार बनून गेला. सगळ्यांत मोठा दुर्दैवी.

५) म्हणजे या उंटीणीला कोणी नुकसान पोहचवू नये. अशाच प्रकारे तिच्या करीता पाणी पिण्याचा जो दिवस असेल, त्यांत पण गडबड केली जाऊ नये. उंटीणी आणि समूदचे लोक, उभयतांकरीता पाण्याचा एक एक दिवस निश्चित करून देण्यात आला होता. याची काळजी घेण्याची ताकीद करण्यात आली. परंतु या जुलमी लोकांनी याची काही पर्वा केली नाही.

६) हे काम एकच मनुष्य कदारने केले होते. कारण की खोडसाळपणांत सर्व लोक पण त्याच्या बरोबर होते. म्हणून याच्यांत सर्वांना समान अपराधी ठरविण्यांत आले आणि खोटे म्हणणे आणि उंटीणीच्या घोडशिरा कांपण्याचा संबंध सर्व लोकांशी जोडण्यांत आला. ज्याने हे तत्त्व ठाऊक झाले की, एक वाईट काम करणारे जर थोडेसे लोक असतील परंतु पूर्ण समाज या वाईटांवर प्रतिबंध करण्याऐवजी, त्याला पसंत करीत असेल तर अल्लाहजवळ संपूर्ण समाज हे वाईट कृत्य करणारा ठरविला जाईल. आणि या अपराध किंवा वाईट कृत्यांत समान शामील झाले असे समजले जाईल.

७) फदमदम अलैय हिम त्यांना नष्ट करून टाकले आणि त्यांच्यावर सक्त शिक्षा अवतरीत केली.

८) सर्वांसाठी करून दिले; म्हणजे या शिक्षेत सर्वांना समान करून दिले. कोणाला सोडले नाही. लहान मोठा सर्वांना नेस्त नाबुद करून टाकण्यांत आले किंवा जमिनीला यांच्यावर बरोबर करून दिले, म्हणजे सर्वांना जमिनीच्या आंत घालून दिले.

९) म्हणजे अल्लाहतआलाला ही भीती नाही की, त्यांने त्यांना शिक्षा केली आहे तर कोणी मोठी शक्ती याचा त्याच्याकडून बदला घेईल. तो परिणामापासून निर्भय आहे. कारण की कोणी अशी शक्ती नाही, जी त्याच्यापेक्षा वरचढ किंवा त्याच्या समानच असावी. जी त्याच्याकडून सूड उगविण्याचे सामर्थ्य बाळगीत असेल.

महावाक्ये २१ | # (९२) सू. अल-लैल | रुकूअ १

آیاتها ٢١ | (٩٢) سورة اللیل مكية (٩) | ركوعها ١

بِسۡمِ اللّٰہِ الرَّحۡمٰنِ الرَّحِیۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

وَالَّیۡلِ اِذَا یَغۡشٰی ۙ﴿۱﴾
शपथ आहे रात्रीची जेव्हा ती आच्छादून जाते.(१) १

وَالنَّہَارِ اِذَا تَجَلّٰی ۙ﴿۲﴾
आणि शपथ आहे दिवसाची, जेव्हा तो उजाडेल.(२) २

وَمَا خَلَقَ الذَّکَرَ وَالۡاُنۡثٰۤی ۙ﴿۳﴾
आणि शपथ आहे त्या व्यक्तित्वाची, ज्याने नर व मादी पैदा केले.(३) ३

اِنَّ سَعۡیَکُمۡ لَشَتّٰی ؕ﴿۴﴾
नि:संशय तुमचे प्रयत्न भिन्न भिन्न प्रकारचे आहेत.(४) ४

فَاَمَّا مَنۡ اَعۡطٰی وَاتَّقٰی ۙ﴿۵﴾
जो मनुष्य (परमार्थात) देत राहील आणि (अल्लाहला) भित राहील.(५) ५

وَصَدَّقَ بِالۡحُسۡنٰی ۙ﴿۶﴾
आणि चांगल्या गोष्टीला मान्य करीत राहील.(६) ६

فَسَنُیَسِّرُہٗ لِلۡیُسۡرٰی ؕ﴿۷﴾
तर आम्ही सुद्धा त्याच्यासाठी सुलभता निर्माण करून देऊ(७) ७

وَاَمَّا مَنۡۢ بَخِلَ وَاسۡتَغۡنٰی ۙ﴿۸﴾
परंतु जो कृपणपणा करील, आणि पर्वा करणार नाही.(८) ८

وَکَذَّبَ بِالۡحُسۡنٰی ۙ﴿۹﴾
आणि सर्वोत्तम गोष्टीला खोटे ठरवील.(९) ९

فَسَنُیَسِّرُہٗ لِلۡعُسۡرٰی ؕ﴿۱۰﴾
तर आम्ही सुद्धा त्याच्या तंगी आणि कठीणतेचा सामान त्याला प्राप्त करून देऊ(१०) १०

१) म्हणजे क्षितिज प्रकाशावर आच्छादून जाईल, ज्याने दिवसाचा प्रकाश संपून आणि अंधार होऊन जाईल.
२) म्हणजे रात्रीचा अंधार संपून आणि दिवसाचा प्रकाश पसरून जाईल.
३) ही अल्लाहने आपली शपथ वाहिली कारण की, पुरुष आणि स्त्री दोघांचा निर्माता अल्लाहच आहे.
४) म्हणजे कोणी चांगली कामे करीत आहे, ज्याचा बदला स्वर्ग आहे. आणि कोणी वाईट कामे करतो ज्याचा बदला नरकाग्नी आहे. हे शपथेचे उत्तर आहे.
५) म्हणजे भलाईच्या कामांत खर्च करेल आणि हराम केलेल्या गोष्टींपासून वांचेल.
६) किंवा चांगल्या मोबदल्याला मान्य करेल; म्हणजे या गोष्टीवर विश्वास ठेवील की, अल्लाहच्या मार्गांत खर्च करेल आणि ईशभयाचा अल्लाहकडून उत्तम मोबदला मिळेल.
७) 'युसरा' चा अर्थ 'पुण्य आणि चांगल्या कामाचे वैशिष्ट्य' असा आहे. म्हणजे आम्ही त्याला सुकृत्ये करण्याची आणि आज्ञापालनाची सुबुद्धी देतो, आणि हे त्याच्यासाठी सुलभ करून देतो. भाष्यकार म्हणतात की, हे महावाक्य ह.अबू बकर सिद्दीक ﷺ च्या बाबतीत अवतीर्ण झाले. ज्यांनी सहा गुलाम मुक्त केलेत. ज्यांना मक्केचे लोक मुसलमान होण्यावरून फार त्रास देत असत. (फत्हुल कदीर)
८) म्हणजे अल्लाहच्या मार्गात खर्च करणार नाही. आणि अल्लाहच्या हुकुमाची पर्वा करणार नाही.
९) किंवा परलोकातील मोबदला आणि हिशेब घेण्याचा इन्कार करील.
१०) 'उसरा' (तंगी) ने अभिप्रेत कुफ्र, पापाचरण आणि वाईट पद्धती आहेत. म्हणजे आम्ही त्याच्यासाठी आज्ञाभंजनाचा मार्ग सोपा करून देऊ; ज्यामुळे त्याच्यासाठी भलाई आणि सद्भाग्याचे मार्ग अंगीकारणे कठीण होऊन जाईल. कुरआन मजीद मध्ये हा विषय कित्येक ठिकाणी सांगण्यांत आला अहे. की जो भलाई आणि हिदायतचा मार्ग अंगीकारतो, त्याच्या मोबदल्यांत अल्लाह त्याला भलाईची सुबुद्धी प्रदान करतो. आणि जो कुकृत्ये आणि पापाचरणाचा मार्ग अंगिकारतो, अल्लाह त्याला त्याच्या स्थितीवर सोडून देतो. आणि हे त्याच्या दैवानुसारच होत असते. जे अल्लाहने आपल्या ज्ञानानुसार लिहून ठेवले आहे. (इब्ने कसीर) हा विषय हदीसमध्ये सुद्धा सांगण्यात आला आहे. नबी ﷺ नी फर्माविले, ''तुम्ही कर्म करा. प्रत्येक मनुष्य ज्या कामाकरीता पैदा केला गेला आहे, ते त्याच्यासाठी सोपे करून दिले जाते. जे सद्भाग्यवाले असतात, त्यांना सद्भाग्यवाल्या कर्मांची सुबुद्धी दिली जाते. आणि जे दुर्दैवी असतात, त्यांना दुर्दैवीवाले कर्म करणे सोपे करून दिले जाते. (स.बुखारी तफसीर, सू.लैल)

وَمَا يُغْنِي عَنْهُ مَالُهُ إِذَا تَرَدَّىٰ ﴿١١﴾
त्याचे द्रव्य त्याच्या पालथ्या पडण्याच्या वेळी, काहीही कामा येणार नाही.[१] ११

إِنَّ عَلَيْنَا لَلْهُدَىٰ ﴿١٢﴾
नि:संशय मार्ग दाखवून देणे ही आमची जबाबदारी आहे.[२] १२

وَإِنَّ لَنَا لَلْآخِرَةَ وَالْأُولَىٰ ﴿١٣﴾
आणि परलोक आणि इहलोक आमच्याच हातांत आहे.[३] १३

فَأَنذَرْتُكُمْ نَارًا تَلَظَّىٰ ﴿١٤﴾
मी तर तुम्हांस धगधगीत आगीपासून भिववून दिले आहे. १४

لَا يَصْلَاهَا إِلَّا الْأَشْقَى ﴿١٥﴾
जिच्यांत फक्त ते दुर्दैवी लोक दाखल होतील. १५

الَّذِي كَذَّبَ وَتَوَلَّىٰ ﴿١٦﴾
ज्यांनी खोटे ठरवले (आणि त्याच्या अनुकरणापासून) तोंड फिरविले[४] १६

وَسَيُجَنَّبُهَا الْأَتْقَى ﴿١٧﴾
आणि इच्यापासून असा मनुष्य दूर ठेवला जाईल, जो पवित्राचरणी असेल.[५] १७

الَّذِي يُؤْتِي مَالَهُ يَتَزَكَّىٰ ﴿١٨﴾
जो शुचिर्भुत होण्यासाठी आपले द्रव्य देत असेल.[६] १८

وَمَا لِأَحَدٍ عِندَهُ مِن نِّعْمَةٍ تُجْزَىٰ ﴿١٩﴾
कोणाचा त्याच्यावर काही उपकार नाही की, ज्याचा बदला दिला जात असावा.[७] १९

إِلَّا ابْتِغَاءَ وَجْهِ رَبِّهِ الْأَعْلَىٰ ﴿٢٠﴾
किंबहुना आपल्या महान आणि परात्पर पालनकर्त्याची मर्जी संपादन करावयाची आहे एवढेच![८] २०

وَلَسَوْفَ يَرْضَىٰ ﴿٢١﴾
खचित्‌च तो (अल्लाह सुद्धा) लवकरच प्रसन्न होऊन जाईल.[९] २१







وَالضُّحَىٰ ﴿١﴾
शपथ आहे 'चाश्त' च्या वेळेची[१०] १

وَاللَّيْلِ إِذَا سَجَىٰ ﴿٢﴾
आणि शपथ आहे रात्रीची, जेव्हा ती आच्छादून जाईल.[११] २

مَا وَدَّعَكَ رَبُّكَ وَمَا قَلَىٰ ﴿٣﴾
न तर तुझ्या पालनकर्त्याने तुला सोडले आहे; आणि न तो नाखुष झाला आहे.[१२] ३

وَلَلْآخِرَةُ خَيْرٌ لَّكَ مِنَ الْأُولَىٰ ﴿٤﴾
खचित्‌च तुझ्याकरीता परिणाम, सुरवातीपेक्षा उत्तम आहे.[१३] ४

وَلَسَوْفَ يُعْطِيكَ رَبُّكَ فَتَرْضَىٰ ﴿٥﴾
तुला तुझा पालनकर्ता फारच लवकर (बक्षीस) देईन, आणि तू प्रसन्न (आणि खूष) होऊन जाशील.[१४] ५

أَلَمْ يَجِدْكَ يَتِيمًا فَآوَىٰ ﴿٦﴾
काय त्याने तुला अनाथ बघून आश्रय दिला नाही?[१५] ६

وَوَجَدَكَ ضَالًّا فَهَدَىٰ ﴿٧﴾
आणि तुला मार्ग भटकलेला पाहून, सरळ मार्ग दाखविला नाही?[१६] ७

وَوَجَدَكَ عَائِلًا فَأَغْنَىٰ ﴿٨﴾
आणि तुला गरीब पाहून, श्रीमंत बनवून टाकले नाही?[१७] ८

१) म्हणजे जेव्हा नर्काग्नीत पडेल, तेव्हा हे द्रव्य, ज्याला तो खर्च करीत नव्हता, काही कामा येणार नाही.

२) म्हणजे हलाल आणि हराम, चांगले आणि वाईट, सरळ मार्गाला लावणे किंवा बहकविणे याला स्पष्ट करणे आणि समजाऊन सांगणे ही आमची जबाबदारी आहे. (जे आम्ही करून टाकले आहे.)

३) आणि उभयतांचे मालक आम्हीच आहोत. याच्यांत जसा इच्छू तसा फेरफार (ढवळा ढवळ) करू. म्हणून या दोघांच्या किंवा यांच्यातून कोण्या एकाच्या इच्छुकाने, आमच्याच जवळ मागावे; कारण की प्रत्येक इच्छुकाला,

आम्हीच आमच्या मर्जीनुसार देत असतो.
४) या महावाक्यरने 'मुर्जीया' पंथाने (जो एक निरर्थक पंथ होऊन गेला) आधार घेतला आहे की, नरकाग्नीत फक्त काफिरच जातील. कोणी मुसलमान मग तो कितीका गुन्हेगांर असेना, नरकाग्नीत जाणार नाही. परंतु ही धारणा या स्पष्ट महावाक्यांच्या विरुद्ध आहे, ज्यांच्याने ठाऊक होते की, पुष्कळसे मुसलमान सुद्धां, ज्यांना अल्लाहतआला काही शिक्षा करू इच्छील, काही काळासाठी नरकाग्नीत जातील. मग ते नबी ﷺ, देवदूत आणि दुसऱ्या सदाचरणी लोकांच्या शिफारशीने काढून घेतले जातील. येथे घेरा करून घेण्याच्या बाबतीत जे सांगितले गेले आहे, त्याचा अर्थ आहे की, जे लोक पक्के काफिर आणि फारच दुर्दैवी आहेत, नरकाग्नी वास्तविक त्यांच्याचसाठी बनविण्यांत आली आहे. ज्यामध्ये ते आवश्यक आणि कायम स्वरुपी आणि नित्यासाठी दाखल होतील. जर काही आज्ञाभंजक प्रकारचे मुसलमान, नरकाग्नीत जातील तर ते आवश्यक, कायम स्वरुपी आणि नित्यासाठी जाणार नाही. किंबहुना शिक्षा म्हणून त्यांचा हा प्रवेश तात्पुरता असेल. (फत्हुल कदीर)
५) म्हणजे नरकाग्नीपासून दूर राहील, आणि स्वर्गात दाखल होईल.
६) म्हणजे जो आपले द्रव्य अल्लाहच्या हुकूमाप्रमाणे खर्च करतो; जेणेकरून त्याचा जीव आणि त्याचे द्रव्य सुद्धा शुचिर्भुत होऊन जावे.
७) म्हणजे (उपकाराचा) बदला फेडण्यासाठी म्हणून खर्च करीत नसावा.
८) किंबहुना प्रांजळ मनाने, अल्लाहच्या सुप्रसन्नतेसाठी, आणि स्वर्गात त्याच्या दर्शनासाठी खर्च करतो.
९) किंवा तो प्रसन्न होऊन जाईल; म्हणजे जो मनुष्य या वैशिष्ट्यांनी परिपूर्ण असेल, अल्लाहतआला त्याला स्वर्गाच्या देणग्या, आदर सन्मान आणि प्रतिष्ठा बहाल करेल ज्यामुळे तो खूष होऊन जाईल. बहुतेक भाष्यकारांनी म्हटले, किंबहुना काहींनी मतैक्यापर्यंत नोंद केली आहे की, ही महावाक्ये ह.अबू बकर सिद्दीक رضي الله عنه च्या सन्मानार्थ अवतीर्ण झाली आहेत. तथापि अर्थ आणि भावार्थाच्या अनुषंगाने हे (सर्वांसाठी) सर्वसाधारण आहे. जो पण या उच्च गुणांनी युक्त असेल, तो अल्लाहच्या दरबारांत याला पात्र समजला जाईल.
✪ एकदा नबी ﷺ आजारी पडले, दोन तीन रात्री आपण ﷺ नी रात्रीच्या तहज्जुद ची नमाज पढली नाही. एक स्त्री आपल्या जवळ आली आणि म्हणू लागली, हे मुहम्मद! (ﷺ) असे वाटते की, तुझ्या शैतानाने तुला सोडून दिले आहे. दोन तीन रात्री मी पहात आहे की, तो तुझ्याजवळ आला नाही. ज्यावर अल्लाहने हा अध्याय अवतरित केला. (स.बुखारी, तफसीर सू.ज्जुहा) ही स्त्री अबुलहबची बायको, उम्मे जमील होती. (फत्हुल बारी)
१०) 'चाश्त' (जुहा) त्या वेळेला म्हणतात, जेव्हा सूर्य उंच होतो; येथे अभिप्रेत पूर्ण दिवस आहे.
११) 'सजा' चा अर्थ आहे 'सकन' म्हणजे जेव्हा अंध:कार पूर्णपणे आच्छादून जाईल, त्यावेळी प्रत्येक वस्तू स्थिर होऊन जाते.
१२) जसे की काफिर समजत आहेत.
१३) किंवा परलोक इहलोकापेक्षा उत्तम आहे. दोन्ही भावार्थ अर्थाच्या दृष्टीकोनातून बरोबर आहेत.
१४) याच्याने ऐहिक सुख संपन्नता, आणि परलोकातील मोबदला आणि पुण्य प्रतिफल अभिप्रेत आहे. याच्यात तो शिफारस करण्याचा हक्कपण दाखल आहे, जो आपण ﷺ ला आपल्या उम्मतमधील गुन्हेगारांसाठी मिळेल.
१५) म्हणजे बापाच्या आधारापासून सुद्धा वंचित होतास. आम्ही तुझी मदत केली.
१६) म्हणजे तुला धर्मशास्त्र आणि ईमान, काय आहे, हे ठाऊक नव्हते. आम्ही तुला सरळ मार्ग दाखविला. पैगंबरी बहाल केली आणि पुस्तक अवतीर्ण केले. नाही तर तू याच्यापूर्वी हिदायतसाठी परेशान होतास!
१७) 'तवंगर' चा अर्थ आहे, आपल्याशिवाय तुला प्रत्येकाकडून निरपेक्ष करून टाकले. तेव्हा तू गरीबीत सहनशील राहिला आणि श्रीमंतीत कृतज्ञ (आभार मानणारा) राहिलास. जसे स्वत: नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमचे सुद्धा फर्मान आहे. ''श्रीमंती, साधन सामुग्रीच्या विपुलतेचे नांव नाही. खरी श्रीमंती मनाची श्रीमंती आहे.'' (स.मुस्लिम)

فَأَمَّا الْيَتِيمَ فَلَا تَقْهَرْ ۝٩
तर अनाथावर तू सुद्धा जुलूम करू नकोस[१] ⑨

وَأَمَّا السَّائِلَ فَلَا تَنْهَرْ ۝١٠
आणि न याचकाला झिडकी (देणे)[२] ⑩

وَأَمَّا بِنِعْمَةِ رَبِّكَ فَحَدِّثْ ۝١١
आणि आपल्या पालनकर्त्याच्या उपकारांना वर्णन करीत रहा.[३] ⑪

## (९४) सू. इन्शेराह

महावाक्ये ८ | रुकूअ १

سورة الانشراح مكية (٩٤) | آياتها ٨ | ركوعها ١

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

أَلَمْ نَشْرَحْ لَكَ صَدْرَكَ ۝١
काय आम्ही तुझे अंत:करण उघडून दिले नाही?[४] ①

وَوَضَعْنَا عَنكَ وِزْرَكَ ۝٢
आणि तुझ्यावरून तुझे ओझे उतरून टाकले.[५] ②

الَّذِي أَنقَضَ ظَهْرَكَ ۝٣
ज्याने तुझी कंबर मोडून टाकली होती. ③

१) किंबहुना याच्याबरोबर नर्मी आणि उपकाराचा मामला कर.

२) म्हणजे त्याच्याशी सक्ती आणि अहंकार करू नकोस. आणि कडक कटू व्यवहार करू नकोस. किंबहुना उत्तरपण द्यावयाचे असेल तरी प्रेमाने द्या.

३) म्हणजे अल्लाहने तुझ्यावर जे उपकार केले आहेत. उदाहरणार्थ, हिदायत आणि पैगंबरी बहाल केली, तू अनाथ असून सुद्धा तुझ्या मदतीची आणि पालन पोषणाची व्यवस्था केली. तुला आहे त्यांत समाधान मानण्याचे आणि मनाची श्रीमंती बहाल केली. वगैरे. याच कृतज्ञपणा व उपकृतपणाच्या भावनेने यांचा उल्लेख करीत रहा. याच्याने ठाऊक झाले की, अल्लाहच्या बक्षीसांची चर्चा, आणि त्यांना जाहीर करणे अल्लाहला आवडते. परंतु गर्व आणि अहंकार म्हणून नाही, किंबहुना अल्लाहची दया आणि कृपा, आणि त्याच्या उपकारांच्या ओझ्याने नतमस्तक होऊन, आणि त्याच्या शक्ती सामर्थ्याला भित राहून की, कोठे तो आम्हांस या देणग्यांपासून वंचित् न करून टाको!

४) मागील अध्यायांत तीन बक्षीसांचा उल्लेख होता. या अध्यायांत आणखी तीन उपकार दाखविले जात आहेत. अंत:करण उघडून देणे, याच्यांत प्रथम आहे. याचा अर्थ आहे अंत:करणाचे तेजोमय होऊन जाणे आणि त्याचे विशाल होऊन जाणे; जेणे करून सत्य स्पष्ट पण होऊन जावे, आणि अंत:करणांत भिजून पण जावे. याच भावार्थात कुरआन करीमचे हे महावाक्य आहे, ''ज्याला अल्लाहतआला हिदायत बहाल करण्याचा इरादा करून घेईल, त्याचे अंत:करण इस्लामसाठी उघडून देतो. (सू.अन्आम-१२५) म्हणजे जो इस्लामला सत्य धर्म म्हणून ओळखून पण घेतो. आणि त्याला मान्य पण करून घेतो. या अंत:करणाच्या उघडण्यात ते अंत:करण (हृदय) चिरणे पण येऊन जाते, जे विश्वसनीय रिवायतीच्या अनुषंगाने दोन वेळा नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमचे केले गेले. एकदा बालपणी, जेव्हा की आपण वयाने चार वर्षाचे होते. ह.जिब्रईल عليه السلام आले आणि त्यांनी आपले हृदय चिरले. आणि त्याच्यातून तो शैतानी भाग काढून टाकला, जो प्रत्येक मनुष्यांत आहे. मग त्याला धुवून बंद करून टाकले. (स.मुस्लिम) दुसऱ्यांदा मेअराजच्या प्रसंगी. यावेळेला आपली शुभ छाती चिरून, आपले हृदय काढण्यात आले. त्याला जमजमच्या पाण्याने धुऊन, आपल्या जागेवर ठेवून देण्यात आले. आणि त्याला ईमान आणि ज्ञानाने भरून देण्यांत आले. (स.बुखारी, स.मुस्लिम)

५) हे ओझे पैगंबरीच्या पूर्वी, चाळीस वर्षीय जीवन काळाशी संबंधित आहे. या काळांत जरी अल्लाहने आपणांस गुन्ह्यांपासून सुरक्षित ठेवले. कोण्या मुर्तीपूढे आपण सिजदा केला नाही, कधी मद्यप्राशन केले नाही, आणखी दुसऱ्या वाईट कृत्यांपासून सुद्धा दूरच राहिले, तरी पण खऱ्या अर्थाने अल्लाहची उपासना आणि आज्ञापालनाचे आपणांस ज्ञान नव्हते तसेच आपण केले सूद्धा नाही. म्हणून आपल्या बुद्धी आणि अंत:करणावर या चाळीस वर्षाच्या उपासना आणि आज्ञापालन न करण्याचे ओझे होते; जे वास्तविक तर नव्हते. परंतु आपल्या समज आणि जाणीवेने याला ओझे बनवून ठेवले होते. अल्लाहने त्याला उतरवून देण्याची घोषणा करून आपल्यावर उपकार केला. हा जणू तोच भावार्थ आहे, ''जेणे करून जे काही गुन्हे मागे केलेले आणि जे मागे राहिले, सर्व अल्लाहतआलाने क्षमा करून टाकावे.'' (सू.अल्फतह) चा आहे. काही म्हणतात, हे पैगंबरीचे ओझे होते. ज्याला अल्लाहने हलके करून दिले. म्हणजे या मार्गाच्या अडचणी सहन करण्याचे धैर्य, आणि धर्मप्रचार, प्रसारामध्ये सुलभता निर्माण करून दिली.

आणि आम्ही तुझा नावलौकीक मोठा केला.[१] ४ — وَرَفَعْنَا لَكَ ذِكْرَكَ ۝٤

तर अलबत संकटांबरोबर सौख्य आहे. ५ — فَإِنَّ مَعَ الْعُسْرِ يُسْرًا ۝٥

खचित्च संकटांबरोबर सौख्य आहे.[२] ६ — إِنَّ مَعَ الْعُسْرِ يُسْرًا ۝٦

तर जेव्हा तू मोकळा असशील, तेव्हा उपासनेमध्ये अधिक मग्न हो.[३] ७ — فَإِذَا فَرَغْتَ فَانصَبْ ۝٧

आणि आपल्या पालनकर्त्याकडे एकाग्रचीत होऊन जा.[४] ८ — وَإِلَىٰ رَبِّكَ فَارْغَب ۝٨

## (९५) सू. तीन

महावाक्ये ८ — रुकूअ १

آياتها ٨ (٩٥) سُورَةُ التِّينِ مَكِّيَّةٌ (٢٨) ركوعها ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

शपथ आहे अंजीर आणि 'जैतून' ची १ — وَالتِّينِ وَالزَّيْتُونِ ۝١

आणि तुरे सीनीन ची[५] २ — وَطُورِ سِينِينَ ۝٢

आणि या शांततावाल्या शहराची[६] ३ — وَهَٰذَا الْبَلَدِ الْأَمِينِ ۝٣

खचित्च आम्ही माणसाला उत्तमांत उत्तम स्वरुपांत निर्माण केले.[७] ४ — لَقَدْ خَلَقْنَا الْإِنسَانَ فِي أَحْسَنِ تَقْوِيمٍ ۝٤

१) म्हणजे जेथे अल्लाहचे नांव येते, तेथेच आपले पण नांव येते. उदाहरणार्थ अजान, नमाज आणि दुसऱ्या पुष्कळशा ठिकाणी, मागल्या पुस्तकांत आपली ﷺ ची चर्चा आणि वैशिष्ट्यांचा तपशील आहे. देवदूतांमध्ये आपल्यासाठी चांगला उल्लेख आहे. आपल्या आज्ञापालनाला, अल्लाहने आपले आज्ञापालन ठरविले आहे आणि आपल्या आज्ञापालनाबरोबरच आपण ﷺ चे पण आज्ञापालन करण्याचा हुकूम दिला; वगैरे.

२) हे आपल्याकरीता आणि सहाबांकरीता शुभवर्तमान आहे; की, तुम्ही इस्लामच्या मार्गात जो त्रास सहन करीत आहांत तर घाबरण्याचे काही कारण नाही. याच्यानंतर लवकरच अल्लाहतआला तुम्हाला सुलभता आणि मोकळेपणा बहाल करीन. आणि झालेही तसेच. ज्याला सर्व दुनिया जाणते.

३) म्हणजे नमाजीपासून किंवा धर्मप्रचारापासून किंवा धर्मयुद्धांपासून तू दुआ मध्ये मेहनत कर; किंवा एवढी उपासना कर की, तू थकून जावे.

४) म्हणजे त्याच्याशीच स्वर्गाची आस बाळग. त्याच्याचजवळ आपल्या आवश्यकता माग आणि सर्व मामल्यांमध्ये त्यावरच विश्वास आणि भरवंसा ठेव.

५) हा तोच तूर पर्वत आहे, जेथे अल्लाहतआलाने ह.मूसा عليه السلام शी संभाषण केले होते.

६) याच्याने अभिप्रेत मक्का मुकर्रमा आहे. ज्यांत युद्धांची परवानगी नाही. याशिवाय जो याच्यात दाखल होऊन जाईल, त्याला पण अभय प्राप्त होऊन जाते. काही भाष्यकार म्हणतात की, ही वास्तविक तीन स्थळांची शपथ आहे. ज्यांतून प्रत्येक ठिकाणी सन्माननीय, धर्मशास्त्रवाले पैगंबर पाठविले गेले. अंजीर आणि जैतूनने अभिप्रेत तो इलाखा आहे. जेथे त्याचे पीक येत. आणि ते आहे बैतुल मुकद्दस (पॅलेस्टाईन) जेथे ह.ईसा عليه السلام पैगंबर बनून आले. 'सिना' किंवा 'सिनीन' पर्वतावर जेथे ह.मूसा عليه السلام ला पैगंबरी बहाल करण्यांत आली. आणि मक्का शहरांत, पैगंबरांचे सरदार ह.मुहम्मद रसूलुल्लाह सल्लल्लाहु अलैहि व सल्लम पैगंबर बनविले गेले. (इब्ने कसीर)

७) हे शपथेचे उत्तर आहे. अल्लाहतआलाने प्रत्येक सृष्टीला अशा प्रकारे निर्माण केले आहे की, तिचे तोंड खालच्या बाजुला झुकलेले आहे. फक्त मनुष्याला उंच काठीचा, सरळ बनविले आहे. जो आपल्या हाताने खातो पितो. मग त्याच्या अवयवांना फारच ठीक ठाक केले. त्याच्यांत जनावरांप्रमाणे बेढंगपणा नाही. प्रत्येक महत्त्वाचे अवयव दोन दोन बनविले आणि त्यांच्यात फारच योग्य अंतर ठेवले. मग त्याच्यांत बुद्धी आणि युक्ती, समज आणि ज्ञान, आणि ऐकणे आणि पाहण्याच्या क्षमता त्याच्यांत ठेवल्यांत जी वास्तविकता अल्लाहची वैशिष्ट्ये आहेत. जणू या अनुषंगाने मनुष्य अल्लाहच्या या वैशिष्ट्यांचा दर्शक आणि प्रतिबिंब आहे. काही धर्मपंडितांनी या हदीसला सुद्धा याच अर्थ आणि भावार्थावर घेतले आहे, ''अल्लाहतआलाने आदमला आपल्या रुपावर निर्माण केले आहे.'' (स.मुस्लिम) मनुष्याच्या निर्मितीमध्ये या तमाम गोष्टींचा अंतर्भावच 'अहसनुल तकवीम' आहे, ज्याचा उल्लेख अल्लाहने तीन शपथांनंतर केला. (फत्हुल कदीर)

ثُمَّ رَدَدْنٰهُ اَسْفَلَ سٰفِلِيْنَ ﴿٥﴾

मग त्याला खडतरांत खडतर करून टाकले.[१] ५

اِلَّا الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ فَلَهُمْ اَجْرٌ غَيْرُ مَمْنُوْنٍ ﴿٦﴾

परंतु ज्या लोकांनी ईमान आणले आणि (मग) सुकृत्ये केलीत, तर त्यांच्यासाठी असा मोबदला आहे, जो कधी संपणार नाही.[२] ६

فَمَا يُكَذِّبُكَ بَعْدُ بِالدِّيْنِ ﴿٧﴾

तर तुला आता निर्णयाच्या दिवसाला खोटे ठरवण्याला कोणत्या गोष्टीने उद्युक्त केले आहे?[३] ७

اَلَيْسَ اللّٰهُ بِاَحْكَمِ الْحٰكِمِيْنَ ﴿٨﴾

काय अल्लाहतआला (सर्व) अधिकाऱ्यांचा अधिकारी नाही?[४] ८



महावाक्ये १९ | (९६) सू. अलक | रुकूअ १

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो



اٰيَاتُهَا ١٩ | (٩٦) سُوْرَةُ الْعَلَقِ مَكِّيَّةٌ (١) | رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

اِقْرَاْ بِاسْمِ رَبِّكَ الَّذِيْ خَلَقَ ﴿١﴾

आपल्या पालनकर्त्याचे नांव घेऊन वांच, ज्याने निर्माण केले.[५] १

خَلَقَ الْاِنْسَانَ مِنْ عَلَقٍ ﴿٢﴾

ज्याने माणसाला रक्ताच्या गोळ्यापासून निर्माण केले.[६] २

اِقْرَاْ وَرَبُّكَ الْاَكْرَمُ ﴿٣﴾

तू वाचत रहा; तूझा पालनकर्ता फार उदार आहे.[७] ३

१) हा इशारा आहे मनुष्याच्या 'अर्‌जली उम्र' (फार जास्त वया) कडे ज्यांत तारुण्य आणि शक्तीनंतर वृद्धत्व आणि दौर्बल्य येऊन जाते. आणि मनुष्याची बुद्धी आणि समज बालकासारखी होऊन जाते. काहींनी याच्याने कर्तृत्वाचा तो कमीपणा घेतला, ज्यात ग्रस्त होऊन मनुष्य अगदी शेवटच्या थराला आणि साप विंचवापेक्षा जास्त क्षुल्लक होऊन जातो. आणि काहींनी याच्याने अपमान आणि फजितीची ती शिक्षा अभिप्रेत घेतली आहे, जी नरकाग्नीत काफिरांकरीता आहे. जणू मनुष्य अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञापालनाकडून तोंड फिरवून आपल्याला 'अहसने तकवीम' च्या उच्च आणि शानवाल्या मर्तब्यापासून खाली पडून नरकाग्नीच्या 'असफल साफेलीन' मध्ये टाकून घेतो.

२) या पूर्वीच्या महावाक्याच्या पहिल्या भावार्थाच्या अनुषंगाने हे स्पष्ट महावाक्य आहे. ईमानवाल्यांच्या स्थितीचे वर्णन करीत आहे. आणि दुसऱ्या तिसऱ्या भावार्थाच्या अनुषंगाने, याच्यापूर्वी ताकीद आहे की, या परिणामापासून त्याने ईमानवाल्यांना वेगळे करून दिले. (फत्हुल कदीर)

३) हे मनुष्याला संबोधन आहे. तंबी आणि कानउघाडणी म्हणून की अल्लाहने तुला उत्तम स्वरुपांत निर्माण केले. आणि तो तुला याच्या उलट, विकृत स्वरूपांत पण बदलून टाकण्याचे सामर्थ्य बाळगतो. याचा अर्थ आहे की, त्याच्या करीता दुसऱ्यांदा निर्माण करणे काही कठीण नाही. असे असून सुद्धा तू कयामत आणि निर्णयाच्या दिवसाला नाकारतो?

४) जो कोणावर जुलूम करीत नाही, आणि त्याच्या न्यायाचाच हा तगादा आहे की, त्याने कयामत घडवून आणावी. आणि त्यांना न्याय द्यावा, ज्यांच्यावर जगात जुलूम झाला.

✿ ५) हे सगळ्यात पहिले वह्य आहे, जे नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमवर त्यावेळी आले, जेव्हा आपण हिराच्या गुहेत, उपासनेत व्यस्त होते. देवदूताने येऊन सांगितले वांच! आपण सांगितले मी तर शिकलेलाच नाही. 'देवदुताने आपणांस धरून जोरांत आवळले आणि म्हटले वांच! आपण पुन्हा तेच उत्तर दिले. अशाप्रकारे त्याने आपणाला वाच वेळा आवळले (तपशीलाकरीता पहावे, स.बुखारी, स. मुस्लिम) 'इकराअ्' जे तुझ्याकडे वह्य केले जात आहे ते तीन 'खलक' ज्याने तमाम सृष्टीला निर्माण केले.

६) सृष्टीमधून खास म्हणून मनुष्याच्या निर्मितीचा उल्लेख केला. ज्यावरून त्याचे मोठेपण स्पष्ट होते.

७) हे ताकीद म्हणून सांगितले आणि याच्यात मोठ्या खुबीने, या सबबीचे सुद्धा निर्सन करून टाकले, जी आपण ﷺ पुढे केली. की मी तर शिकलेलाच नाही. अल्लाहने फर्माविले अल्लाह महान कृपानिदान आहे, वांच! म्हणजे मनुष्यांच्या कोताईंना क्षमा करणे, त्याचे खास वैशिष्ट्य आहे.

**ज्याने लेखणीद्वारे (ज्ञान) शिकविले.**[1] (४)
الَّذِیْ عَلَّمَ بِالْقَلَمِ ۙ ٤

**त्याने माणसाला ते शिकविले, ज्याला तो जाणत नव्हता.** (५)
عَلَّمَ الْاِنْسَانَ مَا لَمْ يَعْلَمْ ۗ ٥

**खरोखर मनुष्य तर काबुच्या बाहेर होऊन जातो.** (६)
كَلَّآ اِنَّ الْاِنْسَانَ لَيَطْغٰۤى ۙ ٦

**यासाठी की तो आपल्या स्वत:ला बेपर्वा (किंवा निरपेक्ष) समजतो.** (७)
اَنْ رَّاٰهُ اسْتَغْنٰى ۗ ٧

**खचित्‌च परतून जाणे तुझ्या पालनकर्त्याकडे (च) आहे.** (८)
اِنَّ اِلٰى رَبِّكَ الرُّجْعٰى ۗ ٨

**(बरे!) त्याला सुद्धा तू पाहिलेस? जो सेवकाला मना करतो;** (९)
اَرَءَيْتَ الَّذِیْ يَنْهٰى ۙ ٩

**जेव्हा की तो सेवक नमाज पढतो.**[2] (१०)
عَبْدًا اِذَا صَلّٰى ۗ ١٠

**बरे ! तर दाखवा जर तो हिदायत वर असेल.**[3] (११)
اَرَءَيْتَ اِنْ كَانَ عَلَى الْهُدٰۤى ۙ ١١

**किंवा पवित्राचरणाचे शिक्षण देत असेल.**[4] (१२)
اَوْ اَمَرَ بِالتَّقْوٰى ۗ ١٢

**बरे पहा तर की जर तो खोटे ठरवत असेल आणि तोंड फिरवित असेल तर**[5] (१३)
اَرَءَيْتَ اِنْ كَذَّبَ وَتَوَلّٰى ۗ ١٣

**काय तो हे जाणत नाही की, अल्लाहतआला त्याला खूप पाहत आहे,**[6] (१४)
اَلَمْ يَعْلَمْ بِاَنَّ اللّٰهَ يَرٰى ۗ ١٤

**खचित्‌च तो पराङ्मुख झाला नाही तर आम्ही त्याचे कपाळाचे केस धरून फरफटत ओढू**[7] (१५)
كَلَّا لَئِنْ لَّمْ يَنْتَهِ ۙ۬ لَنَسْفَعًۢا بِالنَّاصِيَةِ ۙ ١٥

१) 'कलम्' चा अर्थ आहे कांपणे, कोरणे. लेखण्यापण पहिल्या काळात, कोरूनच बनवित असत. म्हणून लिहिण्याच्या साधनाला लेखणी संबोधिले. काही ज्ञान माणसाच्या बुद्धीतच असते. काहीचे प्रकटीकरण मुखाद्धारे होते. आणि काही मनुष्य लेखणीने कागदावर लिहून घेतो. बुद्धीत आणि स्मरणांत जे असते, ते मनुष्याबरोबरच चालले जाते. जिभेने जे जाहीर करतो, ते पण सुरक्षित रहात नाही. तथापि लेखणीने लिहिलेले, जर ते कोण्या कारणाने नष्ट झाले नाही, तर नेहमी सुरक्षित रहाते. याच लेखणीमुळे, सर्वज्ञान, मागील लोकांचा इतिहास, आणि सदाचरणी लोकांच्या ज्ञानाचा सांठा सुरक्षित रहातो. येथपावेतो की, आकाशी ग्रंथांच्या सुरक्षिततेचे साधन पण हेच आहे. याच्यामुळे लेखणीचे महत्त्व खुलासा करावयास पाहिजे असे नाही. म्हणूनच अल्लाहतआलाने सर्व प्रथम लेखणीला निर्माण केले; आणि तिला तमाम सृष्टीचे दैव लिहिण्याचा हुकूम दिला.

२) भाष्यकार म्हणतात की, मना करणाऱ्याने अभिप्रेत अबुजहल आहे. तो इस्लामचा कट्टर शत्रू होता. 'अब्‌दन्' ने अभिप्रेत नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लम आहेत.

३) म्हणजे ज्याला हा नमाज पढण्यापासून मना करीत आहे, तो सन्मार्गावर असेल.

४) म्हणजे प्रांजलपणा, एकेश्वरवाद, आणि चांगली कामे करण्याचे शिक्षण. ज्यामुळे नरकाग्नीच्या आगीपासून मनुष्य वांचू शकतो. तर काय या गोष्टी (नमाज पढणे आणि सदाचरणाचे शिक्षण देणे) अशी आहेत की ज्यांचा विरोध केला जावा आणि त्याच्यावर त्याला धमक्या दिल्या जाव्यात?

५) म्हणजे हा अबुजहल अल्लाहच्या पैगंबराला खोटे ठरवत असेल आणि ईमान आणण्यापासून तोंड फिरवित असेल अरअय्‌त म्हणजे 'मला दाखवा' आहे.

६) अर्थ हा आहे की, हा मनुष्य जो चर्चित हरकती करीत आहे. काय जाणीत नाही की, अल्लाहतआला सर्व काही पहात आहे. तो त्याला याचा मोबदला देईल.

७) म्हणजे नबी सल्लल्लाहु अलैहि व सल्लमला विरोध आणि त्यांच्याशी शत्रुत्वाने, आणि आपणांस नमाज पढण्यापासून जे मना करीत आहेत, यापासून माघार घेतली नाही. 'लनस्‌फअन्न' चा अर्थ आहे तर आम्ही त्याला कपाळावाटे पकडून फरफटत ओढू. हदीसमध्ये येते अबुजहल ने म्हटले होते की जर मुहम्मद (सल्लल्लाहू अलैहि व सल्लम) काब्याजवळ नमाज पढण्यापासून पराङमुख झाला नाही, तर मी त्याच्या मानेवर पाय ठेवून देईन. (म्हणजे त्याला तुडवून टाकेन आणि अशाप्रकारे त्याला अपमानीत करीन) नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमला जेव्हा ही गोष्ट समजली तेव्हा आपण फर्माविले ''जर तो असे करतांतर देवदूत त्याला पकडून घेते'' (स.बुखारी)

نَاصِيَةٍ كَاذِبَةٍ خَاطِئَةٍ ﴿١٦﴾
असे कपाल जे लबाड पापी आहे.[1] ⑯

فَلْيَدْعُ نَادِيَهُ ﴿١٧﴾
हा आपल्या साथीदारांना बोलावून घेवो. ⑰

سَنَدْعُ الزَّبَانِيَةَ ﴿١٨﴾
आम्हीपण (नरकाग्नीच्या) शिपायांना बोलावून घेऊ[2] ⑱

كَلَّا لَا تُطِعْهُ وَاسْجُدْ وَاقْتَرِبْ ﴿١٩﴾
खबरदार! याचे म्हणणे मुळीच मानू नका आणि सिजद्यांमध्ये आणि अल्लाहचे सानिध्य प्राप्त करण्यांत लागून राहा. ⑲

## (९७) सू. अल-कद्र

महावाक्ये ५ | रुकूअ १

آيَاتُهَا ٥ (٩٧) سُورَةُ الْقَدْرِ مَكِّيَّةٌ (٢٥) رُكُوعُهَا ١

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

إِنَّا أَنزَلْنَاهُ فِي لَيْلَةِ الْقَدْرِ ﴿١﴾
खचित्‌च आम्ही याला कद्रच्या रात्री अवतीर्ण केले.[3] ①

وَمَا أَدْرَاكَ مَا لَيْلَةُ الْقَدْرِ ﴿٢﴾
तू काय समजलास की, कद्रची रात्र काय आहे?[4] ②

لَيْلَةُ الْقَدْرِ خَيْرٌ مِّنْ أَلْفِ شَهْرٍ ﴿٣﴾
कद्रची रात्र एक हजार महिन्यांपेक्षा उत्तम आहे.[5] ③

१) म्हणजे लबाड आहे आपल्या गोष्टीत, पापी आहे आपल्या कर्मात.

२) हदीसमध्ये येते की, नबी ﷺ, खाना-ए-काबाजवळ नमाज पढत होते. अबुजहल तेथून गेला तेव्हा म्हणाला हे मुहम्मद! (ﷺ) मी तुला नमाज पढण्यापासून मना केले नव्हते? आणि फारच धमकी युक्त गोष्टी आपणाशी केल्या. आपण ﷺ नी रोख ठोक उत्तर दिले. तेव्हा म्हणाला की हे मुहम्मद ! (सल्लल्लाहू अलैहि व सल्लम) तू मला कोणत्या गोष्टीपासून भिवविता? अल्लाह शपथ! या घाटीत सर्वांत जास्त माझा पक्ष घेणारे आणि माझे बैठकी आहेत. ज्यावर हे महावाक्य अवतीर्ण झाले. ह.इब्ने अब्बास رضي الله عنه फर्मावितात, जर तो आपल्या पक्षकारांना बोलाविता, तर त्याचवेळी शिक्षेचे देवदूत त्यांना धरून घेते. (तिर्मिझी मुसनद अहमद) आणि स.मुस्लिम चे शब्द आहेत की, त्याने पुढे सरकून आपल्या मानेवर पाय ठेवण्याचा इरादा केला. तेव्हा एकदम उलटपायी मागे फिरला आणि आपल्या हातांनी आपला बचाव करू लागला. त्याला विचारण्यांत आले, काय बात आहे? तो म्हणाला की माझ्या आणि मुहम्मद ﷺ च्या दर्म्यान आगचा खंदक, भयानक दृष्य आणि पुष्कळसे पंख आहेत. ''रसूलुल्लाह सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी फर्माविले, जर तो माझ्याजवळ आला असतांतर देवदुतांनी त्याच्या बोट्या बोट्या तोडून घेतल्या असत्या.'' अल्‌जबानिया, दारोगे आणि पोलीस. म्हणजे सशक्त सैन्य. ज्याचा कोणी सामना करू शकत नाही.

✿ या अध्यायाच्या मक्की आणि मदनी होण्यांत मतभेद आहेत. याचे कारण नांव ठेवण्यांत पण मतभेद आहेत. कदरचा अर्थ दर्जा, मर्तबा पण आहे. म्हणून शबे कद्र म्हणतात. याचा अर्थ अंदाज आणि निर्णय करण्याचा पण आहे. याच्यांत वर्षभराचे निर्णय केले जातात. म्हणून हिला 'लैलतुल् हुकूम' पण म्हणतात. याचा अर्थ तंगीचा पण आहे. या रात्री इतक्या भरपूर संख्येत देवदूत जमिनीवर उतरतात की, जमीन तंग होऊन जाते. शबे कद्र म्हणजे तंगीची रात्र किंवा यासाठी हे नांव ठेवण्यात आले की, या रात्रीत जी उपासना केली जाते, अल्लाहजवळ त्याची फार कदर आहे. आणि याच्यावर मोठे पुण्यप्रतिफळ आहे. इच्या निश्चितीत सुद्धा खूपच मतभेद आहेत. तथापि हदीशी आणि आसारने स्पष्ट आहे की, ही रमजानच्या शेवटच्या दशकांतील विषम रात्रीतून कोणी एक रात्र असते. इला लपवून ठेवण्यांत हीच युक्ती आहे की, लोकांनी पाचही विषम रात्रीतून, तिचे महात्म्य प्राप्त करण्याच्या आवडीने अल्लाहची उपासना करावी.

३) म्हणजे अवतरणास सुरवात केली. किंवा लौहे महफूज मधून याला 'बैतुल इज्जत' मध्ये, जे या जगाच्या आकाशावर आहे, एकाच वेळी उतरवून दिले; आणि तेथून आवश्यकतेनुसार, नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमवर उतरत राहिले; येथ पावेतो की २३ वर्षांत पूर्ण होऊन गेले आणि लय्‌लतुल कद्र रमजानमध्ये असते. जसे की कुरआनाचे महावाक्य ''शह्‌रू रमजानल्लजी उन्‌जिल फी हिल् कुरआन'' (सू.अल्‌बकर:१८५) ने स्पष्ट आहे.

४) या प्रश्न विचारण्याने या रात्रीचे श्रेष्ठत्व आणि महत्त्व स्पष्ट आहे. जणूकी, कोणी त्याचा थाह घेऊ शकत नाही. (त्याच्या तळापर्यंत पोहचू शकत नाही.) हा फक्त एक अल्लाहच आहे जो याला जाणतो.

५) म्हणजे या एका रात्रीची उपासना, हजार महिन्याच्या उपासनेपेक्षा, उत्तम आहे. आणि हजार महिने, ८३ वर्षे, ४ महिने होतात. हा उम्मते मुहम्मदिया वर अल्लाहचा किती मोठा उपकार आहे की, संक्षिप्त आयुष्यांत जास्तीत जास्त पुण्यप्रतिफल मिळविण्याकरीता, कशी सवलत बहाल करून दिली.

تَنَزَّلُ الْمَلٰٓئِكَةُ وَالرُّوْحُ فِيْهَا بِاِذْنِ رَبِّهِمْ ۚ مِنْ كُلِّ اَمْرٍ ۝٤

इच्यांत (प्रत्येक कामाची) व्यवस्था करण्यासाठी, अल्लाहच्या हुकूमाने देवदूत आणि आत्मा (जिब्रईल अ.) उतरतात[२] ४

سَلٰمٌ ۛ هِيَ حَتّٰى مَطْلَعِ الْفَجْرِ ۝٥

ही रात्र निव्वळ अभय आणि शांतीची असते. [३] आणि ती अरूणोदय पर्यंत (रहात असते) ५

## (९८) सू. अल-बय्यन:

महावाक्ये ८ | रुकूअ १

(٩٨) سُوْرَةُ الْبَيِّنَةِ مَدَنِيَّةٌ (١٠٠) | اٰيَاتُهَا ٨ | رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

لَمْ يَكُنِ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ اَهْلِ الْكِتٰبِ وَالْمُشْرِكِيْنَ مُنْفَكِّيْنَ حَتّٰى تَاْتِيَهُمُ الْبَيِّنَةُ ۝١

ग्रंथधारी लोकांतील काफिर [४] आणि मुशरिक लोक, [५] जोपर्यंत त्यांच्याजवळ स्पष्ट प्रमाण न येऊन जाईल, माघार घेणारे नव्हते. १

رَسُوْلٌ مِّنَ اللّٰهِ يَتْلُوْا صُحُفًا مُّطَهَّرَةً ۝٢

अल्लाहतआलाचा एक पैगंबर[६] ज्याने पवित्र पाने वांचून दाखवावी. [७] २

فِيْهَا كُتُبٌ قَيِّمَةٌ ۝٣

ज्यांत बरोबर आणि योग्य आदेश असावेत. [८] ३

وَمَا تَفَرَّقَ الَّذِيْنَ اُوْتُوا الْكِتٰبَ اِلَّا مِنْ بَعْدِ مَا جَآءَتْهُمُ الْبَيِّنَةُ ۝٤

ग्रंथधारी आपल्याजवळ स्पष्ट प्रमाण आल्यानंतरच (मतभेदांत पडून) भिन्न भिन्न होऊन गेलेत. [९] ४

२) आत्म्याने अभिप्रेत, ह.जिब्राईल عليه السلام आहेत. म्हणजे देवदूत ह.जिब्राईल عليه السلام समवेत, या रात्रीत जमिनीवर उतरतात. त्या कामांना पूर्ण करण्यासाठी, ज्यांचा निर्णय या वर्षांत अल्लाहतआला घेतो.

३) म्हणजे इच्यांत वाईट नाही. किंवा या अर्थांत अभय आणि शांतीवाली आहे की, ईमानवाले या रात्रीत शैतानाच्या वाईट करण्यापासून सुरक्षित रहातात. किंवा देवदूत ईमानवाल्यांना सलाम पेश करतात. किंवा देवदूत आपसांत एक दुसऱ्याला सलाम करतात. शबे कद्र करीता, नबी ﷺ नी खास म्हणून ही दुआ सांगितली आहे, ''अल्लाहुम्म इन्नक अफुव्वून, तुहिब्बुल अफव, फअ्फ् अन्नी.'' (हे अल्लाह तू क्षमाकर्ता आहे. क्षमेस पसंत करतो, तर मला क्षमा कर) (तिर्मिझी,इब्ने माजा)

✲ याचे दुसरे नांव सू. 'लम् यकुन' पण आहे. हदीसमध्ये आहे नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी ह.उबई बिन कअ्ब رضي الله عنه ला फर्माविले, अल्लाहने मला हुकूम दिला आहे की, मी सू.लमयकुन तुला वांचवून दाखवावा. ह.उबई नी विचारले काय अल्लाहने आपल्या समोर माझे नांव घेतले आहे? आपण फर्माविले ''होय ! ज्यावर (अत्यानंदाने) ह.उबईच्या डोळ्यांत अश्रू येऊन गेलेत. (स.बुखारी)

४) याच्याने अभिप्रेत यहूदी आणि खिस्ती आहेत.

५) मुशरिक ने अभिप्रेत अरब आणि अरबेतर, चे ते लोक आहेत जे मूर्ती आणि अग्नीचे पुजारी होते. 'मुनफक्कीन' माघार घेणारे. 'बय्यीनतून' (प्रमाण) ने अभिप्रेत नबी करीम ﷺ आहेत. म्हणजे यहूदी आणि खिस्ती, आणि अरब आणि अरबेतरांतील मुशरिक लोक, आपल्या कुफ्र शिर्कपासून, माघार घेणार नाही, येथपावेतो की, त्यांच्याजवळ मुहम्मद ﷺ कुरआन घेऊन येतील. आणि ते त्यांचे बहकणे आणि अज्ञान त्यांना सांगतील. आणि त्यांना ईमानाचे आवाहन करतील.

६) म्हणजे ह.मुहम्मद ﷺ.

७) म्हणजे कुरआन मजीद, जे लौहे महफुजच्या पवित्र पानांत नमुद आहे.

८) येथे 'कुतुब' ने अभिप्रेत धर्माचे आदेश आणि 'कय्यीम:' म्हणजे मध्यममार्गी आणि सरळ.

९) म्हणजे ग्रंथधारी लोक ह.नबी करीम ﷺ च्या आगमनापूर्वी एकत्रित होते. येथपावेतो की, आपणांस पैगंबरी बहाल केली. याच्यानंतर ते भिन्न भिन्न होऊन गेले; यांच्यातून काही ईमानवाले होऊन गेले, परंतु बहुतायता मात्र ईमानापासून वंचित्‌च राहिली. नबी ﷺ च्या आगमन आणि पैगंबरीला प्रमाण संबंधित करण्यांत हाच मुद्दा आहे की, आपले सत्त्यत्व स्पष्ट होते. ज्यांत नाकारण्या सारखे काहीच, नव्हते. परंतु या लोकांनी आपल्याला खोटे निव्वळ द्वेष आणि अहंकारामुळे म्हटले. हेच कारण आहे की, येथे भिन्न भिन्न होणाऱ्यांमध्ये फक्त ग्रंथधारी लोकांचेच नांव घेतले आहे. वास्तविक दुसऱ्यांनी सुद्धा खोटे ठरवले होते. कारण की, हे तथापि (ग्रंथधारी) ज्ञानवाले होते आणि आपल्या आगमणाची आणि वैशिष्ट्यांची चर्चा त्यांच्या पुस्तकांत उपस्थित होती.

وَمَآ اُمِرُوْٓا اِلَّا لِيَعْبُدُوا اللّٰهَ مُخْلِصِيْنَ لَهُ الدِّيْنَ ۙ حُنَفَآءَ وَيُقِيْمُوا الصَّلٰوةَ وَيُؤْتُوا الزَّكٰوةَ وَذٰلِكَ دِيْنُ الْقَيِّمَةِ ۝٥

त्यांना याच्याशिवाय कोणताही हुकूम दिला गेला नाही (१) की, त्यांनी फक्त अल्लाहची उपासना करावी. त्याच्याच करीता धर्माला शुद्ध ठेवावे. इब्राहीम हनीफच्या (२) धर्मावर; आणि नमाजीला कायम करावे. आणि जकात देत रहावी. हाच धर्म सरळ आहे. (३) ⑤

اِنَّ الَّذِيْنَ كَفَرُوْا مِنْ اَهْلِ الْكِتٰبِ وَالْمُشْرِكِيْنَ فِيْ نَارِ جَهَنَّمَ خٰلِدِيْنَ فِيْهَا ؕ اُولٰٓئِكَ هُمْ شَرُّ الْبَرِيَّةِ ۝٦

नि:संशय जे लोक ग्रंथधारींमधून काफिर झालेत. आणि मुशरिक लोक, ते नरकाग्नीच्या आगीत जातील, जेथे ते सदासर्वदा राहतील. हेच लोक सृष्टीतील सर्वांत वाईट आहेत. (४) ⑥

اِنَّ الَّذِيْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ ۙ اُولٰٓئِكَ هُمْ خَيْرُ الْبَرِيَّةِ ۝٧

ज्या लोकांनी ईमान आणले आणि चांगली कामे केली, हेच लोक सृष्टीत सर्वांत उत्तम आहेत. (५) ⑦

جَزَآؤُهُمْ عِنْدَ رَبِّهِمْ جَنّٰتُ عَدْنٍ تَجْرِيْ مِنْ تَحْتِهَا الْاَنْهٰرُ خٰلِدِيْنَ فِيْهَآ اَبَدًا ؕ رَضِيَ اللّٰهُ عَنْهُمْ وَرَضُوْا عَنْهُ ؕ ذٰلِكَ لِمَنْ خَشِيَ رَبَّهٗ ۝٨

त्यांचा बदला, त्यांच्या पालनकर्त्याजवळ, नित्य रहाण्याचे स्वर्ग आहेत, ज्यांच्याखाली पाण्याचे पाट वहात आहेत. ज्यांत सदासर्वदा राहतील. अल्लाहतआला त्यांच्याशी राजी झाला. (६) आणि हे त्याच्याशी राजी झाले (७) आणि हे त्याच्यासाठी आहे जो आपल्या पालनकर्त्याला भितो (८) ⑧

ع ٨ / २३

## (९९) सू. ज़िलज़ाल

महावाक्ये ८ — रुकूअ १

(٩٩) سُوْرَةُ الزِّلْزَالِ مَدَنِيَّةٌ (٩٣) — اٰيَاتُهَا ٨ — رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِذَا زُلْزِلَتِ الْاَرْضُ زِلْزَالَهَا ۝١

जेव्हा पृथ्वी पूर्णपणे मोठ्या जोराने हालवून दिली जाईल. (१) ①

१) म्हणजे यांच्या पुस्तकांत त्यांना हुकूम दिला गेला होता की,...........

२) 'हनीफ' चा अर्थ आहे. एकाग्रतेकडे वळणे. कोण्या एकाकडे एकाग्र होऊन. जसे ह.इब्राहीम عليه السلام नी केले. म्हणजे शिर्ककडून एकेश्वरवादाकडे आणि सर्व धर्मांकडून फिरुन इस्लाम धर्माकडे एकाग्र होणे.

३) हाच मिल्लत किंवा उम्मतचा धर्म आहे जो सरळ आणि मध्यममार्गी आहे. बहुतेक इमामांनी या महावाक्याने या गोष्टीचा आधार घेतला आहे की, कर्मे ईमानांत दाखल आहेत. (इब्ने कसीर)

४) हे अल्लाहचे पैगंबर आणि त्याच्या पुस्तकांचा इन्कार करणाऱ्यांचा परिणाम आहे. तसेच त्यांना सर्व सृष्टीत वाईटांहून वाईट ठरविण्यांत आले.

५) म्हणजे ज्यांनी मनाने ईमान आणले आणि ज्यांनी आपल्या अवयवांनी चांगली कामे केली. ते सर्व सृष्टीहून उत्तम आणि श्रेष्ठ आहेत. जे ज्ञानी या गोष्टीला मान्य करता की ईमानवाले सेवक, देवदूतांपेक्षा प्रतिष्ठा आणि कृपेत, उत्तम आहेत. त्यांचे एक प्रमाण हे महावाक्य आहे.

६) त्यांचे ईमान आज्ञापालन आणि चांगल्या कामांमुळे, आणि अल्लाहची सुप्रसन्नता सर्वांत मोठी गोष्ट आहे. ''व रिजवान मिनल्लाहे अकबर'' (सू.तौबा-७२)

७) यासाठी की, अल्लाहने त्यांना अशा देणग्या बहाल केल्या, ज्यांत त्यांचे आत्मे आणि शरीरे दोघांचे सौभाग्य आहे.

८) म्हणजे हा मोबदला आणि सुप्रसन्नता, त्या लोकांकरीता आहे, जे जगांत अल्लाहला भित राहिले. आणि या भीतीमुळे अल्लाहच्या आज्ञाभंगापासून वांचत राहिले. जर कोण्या वेळी या मानवी तगाद्यांमुळे आज्ञाभंजन होऊन गेले तर लगेच तौबा करून घेतली. आणि भविष्यासाठी आपली सुधारणा करून घेतली. येथपावेतो की, त्यांना मृत्यू आज्ञापालनावर आला न की गुन्ह्यांवर. याचा अर्थ आहे की, अल्लाहला भिणारा, गुन्ह्यांवर आग्रह आणि कायम राहूंशकत नाही. आणि जो असे करतो, वास्तवात त्याचे मन अल्लाहच्या भयापासून रिक्त आहे.

✻ याच्या मदनी किंवा मक्की होण्यांत मतभेद आहेत. याच्या महात्म्यात बऱ्याच रिवायती आलेल्या आहेत. परंतु याच्यातून कोणी रिवायत सहीह नाही.

१) याचा अर्थ आहे तीव्र भूकंपाने सारी जमीन हादरुन जाईल. आणि प्रत्येक वस्तू तुटून फुटून जाईल. हे त्यावेळी होईल, जेव्हा पहिला सूर फुंकला जाईल.

وَ اَخۡرَجَتِ الۡاَرۡضُ اَثۡقَالَهَا ۙ﴿۲﴾
आणि आपली ओझी बाहेर काढून फेकून देईल.[१] ②

وَ قَالَ الۡاِنۡسَانُ مَا لَهَا ۚ﴿۳﴾
मनुष्य म्हणू लागेल की, इला काय होऊन गेले?[२] ③

یَوۡمَئِذٍ تُحَدِّثُ اَخۡبَارَهَا ۙ﴿۴﴾
त्या दिवशी जमीन आपले सर्व वृत्तांत सांगून टाकेल.[३] ④

بِاَنَّ رَبَّكَ اَوۡحٰی لَهَا ؕ﴿۵﴾
यासाठी की तुझ्या पालनकर्त्याने तिला हुकूम दिला असेल.[४] ⑤

یَوۡمَئِذٍ یَّصۡدُرُ النَّاسُ اَشۡتَاتًا ۬ۙ لِّیُرَوۡا اَعۡمَالَهُمۡ ؕ﴿۶﴾
त्या दिवशी लोक भिन्न भिन्न समूह होऊन परततील,[५] जेणे करून त्यांना त्यांची कर्मे दाखवून दिली जावीत.[६] ⑥

فَمَنۡ یَّعۡمَلۡ مِثۡقَالَ ذَرَّۃٍ خَیۡرًا یَّرَهٗ ؕ﴿۷﴾
तर ज्याने कणाबरोबर पुण्य केले असेल तो त्याला पाहून घेईल.[७] ⑦

وَ مَنۡ یَّعۡمَلۡ مِثۡقَالَ ذَرَّۃٍ شَرًّا یَّرَهٗ ٪﴿۸﴾
आणि ज्याने कणाबरोबर पाप केले असेल, तो त्याला पाहून घेईल[८] ⑧

اٰیَاتُهَا ۱۱ ﴿۱۰۰﴾ سُوۡرَۃُ الۡعٰدِیٰتِ مَکِّیَّۃٌ ﴿۱۴﴾ رُکُوۡعُهَا ۱

## (१००) सू. आदियात

महावाक्ये ११ — रुकूअ १

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِیۡمِ

وَ الۡعٰدِیٰتِ ضَبۡحًا ۙ﴿۱﴾
सुस्कारे टाकत धावणाऱ्या घोड्याची शपथ[१] ①

१) म्हणजे जमिनीत जेवढी माणसे दफन आहेत, ते जमिनीचे ओझे आहे. ज्यांना जमीन, कयामतच्या दिवशी बाहेर काढून फेंकून देईल. म्हणजे अल्लाहच्या हुकुमाने सर्व जिवंत होऊन बाहेर निघून येतील. हे दुसऱ्या सुरांत होईल. अशाच प्रकारे जमिनीचे खजिने सुद्धा बाहेर निघून येतील.

२) म्हणजे भयभित होऊन म्हणेल की, इला काय होऊन गेले आहे? ही काय अशा प्रकारे हलत आहे? आणि आपले खजिने ओकत आहे?

३) हदीस मध्ये आहे की, नबी ﷺ नी हे महावाक्य पठण केले आणि विचारले, तुम्ही जाणता? जमिनीच्या बातम्या काय आहेत? सहाबांनी अर्ज केला, अल्लाह आणि त्याचे पैगंबर चांगल्या प्रकारे जाणतात. आपण ﷺ फर्माविले, तिच्या बातम्या या आहेत की, ज्या सेवकाने किंवा सेविकेने जमिनीच्या पृष्ठभागावर जे काही केले असेल, त्याची साक्ष देईल. सांगेन अमुक अमुक माणसाने, अमुक अमुक कर्म, अमुक अमुक दिवशी केले होते.'' (तिर्मिझी मुसनद अहमद ३७४/२)

४) म्हणजे जमिनीला हे बोलण्याचे सामर्थ्य अल्लाहतआला प्रदान करेल. म्हणून याच्यांत आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट नाही. ज्याप्रमाणे मनुष्याचे अवयवांमध्ये अल्लाहतआला हे सामर्थ्य निर्माण करून देईल. जमिनीला पण अल्लाहतआला बोलणारी बनवून देईल, आणि ती अल्लाहच्या हुकुमाने बोलेल.

५) म्हणजे कबरीतून निघून हिशोबाच्या जागेकडे किंवा हिशेबानंतर, स्वर्ग आणि नर्काकडे परततील. 'अशतातन्' भिन्न भिन्न म्हणजे टोळ्या टोळ्या. काही निर्भय राहतील, काही भयभित, काहींचे रंग पांढरे असतील, जसे स्वर्गवाश्यांचे असतील. आणि काहीचे रंग काळे असतील, जे त्यांच्या नर्कवासी होण्याचे चिन्ह असेल. काहींचा रोख उजवीकडे असेल, काहींचा डावीकडे. किंवा हे वेगवेगळे समूह धर्म, पंथ आणि कर्मे आणि कृत्ये यांच्या आधारावर असतील.

६) म्हणजे जमीन आपल्या बातम्या यासाठी सांगेन की, माणसांची कर्मे दाखवून दिली जावी.

७) मग तो याच्याने खूष होऊन जाईल.

८) तो यावर फारच पश्चात्ताप पावेल, आणि व्याकूळ होईल. 'जर्रतीन' काहीजवळ मुंगीपेक्षा सुद्धा लहान वस्तूंआहे. काही शब्दकोशवाले म्हणतात, मनुष्य जमिनीवर हात मारतो, त्यामुळे त्याच्या हाताला जी माती लागते, ती 'जर्र:' आहे काहींच्याजवळ छिंद्रातून येणाऱ्या सूर्य किरणांमध्ये धुळीचे जे कण दिसतात, ते 'जर्र:' आहेत. परंतु ईमाम शौकानीने पहिल्या अर्थाला प्राधान्य दिले आहे. ईमाम मुकातील म्हणतात की, हा अध्याय त्या दोन माणसांच्या बाबतीत अवतीर्ण झाला आहे, ज्यांच्यातून एक मनुष्य मागणाऱ्याला थोडासा दानधर्म करण्याला विलंब करीत होता; आणि दुसरा मनुष्य लहान अपराध करण्यांस काही भीती बाळगत नव्हता.

✿ १) 'आदियात' म्हणजे तेच धांवणारे घोडे. 'जबहून' चा अर्थ काहीजवळ हांपणे आणि काहीजवळ खिंकाळणे आहे. अभिप्रेत ते घोडे आहेत, जे हांफतात किंवा खिंकाळत जिहादमध्ये वेगाने शत्रुकडे धांवतात.

**मग टाप मारून ठिणग्या पाडणाऱ्यांची शपथ[१] (२)** — فَالْمُوْرِيٰتِ قَدْحًا ۙ﴿٢﴾

**मग प्रात:समयी धांवा बोलणाऱ्यांची (शपथ)![२] (३)** — فَالْمُغِيْرٰتِ صُبْحًا ۙ﴿٣﴾

**तर त्यावेळी ते धूळ उडवितात.[३] (४)** — فَاَثَرْنَ بِهٖ نَقْعًا ۙ﴿٤﴾

**मग सेनेंच्या दर्म्यान घुसून जातात.[४] (५)** — فَوَسَطْنَ بِهٖ جَمْعًا ۙ﴿٥﴾

**नि:संशय मनुष्य आपल्या पालनकर्त्याचा फारच अनुपकारी आहे[५] (६)** — اِنَّ الْاِنْسَانَ لِرَبِّهٖ لَكَنُوْدٌ ۚ﴿٦﴾

**आणि खचित्‌च तो स्वत: सुद्धा या गोष्टीला साक्षी आहे.[६] (७)** — وَاِنَّهٗ عَلٰى ذٰلِكَ لَشَهِيْدٌ ۚ﴿٧﴾

**तो द्रव्याच्या प्रितीत पण फारच सक्त आहे.[७] (८)** — وَاِنَّهٗ لِحُبِّ الْخَيْرِ لَشَدِيْدٌ ۗ﴿٨﴾

**काय त्याला तो वेळ ठाऊक नाही, जेव्हा कबरेतील सर्व काढून घेतले जातील.[८] (९)** — اَفَلَا يَعْلَمُ اِذَا بُعْثِرَ مَا فِي الْقُبُوْرِ ۙ﴿٩﴾

**आणि मनातील गुप्त गोष्टी जाहीर करून देण्यात येतील.[९] (१०)** — وَحُصِّلَ مَا فِي الصُّدُوْرِ ۙ﴿١٠﴾

**नि:संशय त्यांचा पालनकर्ता त्या दिवशी त्यांच्या स्थितीशी पूर्ण वाकबगार असेल.[१०] (११)** — اِنَّ رَبَّهُمْ بِهِمْ يَوْمَئِذٍ لَّخَبِيْرٌ ۧ﴿١١﴾

१) 'मुरीयात' म्हणजे ठिणग्या उडविणारे. 'कद्‌हून' चा अर्थ आहे, गुडघे किंवा टापांचे एक दुसऱ्याला टकरविणे. किंवा टाप मारणे. म्हणजे त्या घोड्यांची शपथ ज्यांच्या टापांच्या रगडण्याने दगडातून ठिणग्या निघतात; जशा चकमकीतून निघतात.

२) 'मुगीरातुन म्हणजे  रात्रीच्या वेळी हल्ला करणारे. सुबहन म्हणजे सकाळच्या वेळी, अरबांमध्ये सर्व साधारणपणे हल्ला याचवेळी केला जात असे. छापा तर ते मारतात जे सैनिक घोड्यावर स्वार असतात. परंतु याचा संबंध घोड्याशी यासाठी जोडला आहे की, धांवा बोलण्यांत हे सैनिकांच्या फार जास्त कामी येतात.

३) असार, उडविणे. 'नकअुन', धूळ म्हणजे हे घोडे ज्यावेळी वेगाने धांवतात किंवा धांवा बोलतात तेव्हा त्या जागी धूळ आच्छादून जाते.

४) 'फवसत्न' दर्म्यान मध्ये घुसून जातात. यावेळी, किंवा धुळीच्या वातावरणांत. 'जमअन्', शत्रुचे सैन्य. अर्थ आहे की त्यावेळी किंवा जेव्हा वातावरणांत धुळीने भरलेले असते. हे घोडे शत्रुच्या सैन्यांत घुसून जातात. आणि घनघोर युद्ध करतात.

५) हे शपथेचे उत्तर आहे. मनुष्याने अभिप्रेत काफिर, म्हणजे काही माणसे आहेत. 'कनुद' च्या अर्थात अनुपकारी (कृतघ्न)

६) म्हणजे मनुष्य स्वत: सुद्धा आपल्या कृतघ्नतेची साक्ष देतो. काही 'लशहीद' चा 'फाईल' अल्लाहला ठरवितात. परंतु ईमाम शौकानीने पहिल्या भावार्थाला योग्य ठरविले आहे. कारण की, याच्या पूर्वीच्या महावाक्यांमध्ये जमीर चा मर्जा मनुष्यच आहे. म्हणून येथे सुद्धा मनुष्यच होणे जास्त बरोबर आहे.

७) 'खैर' ने अभिप्रेत द्रव्य आहे. जसे एक दुसरा भावार्थ हा आहे की, फारच लोभी आणि कंजुष आहे. जो द्रव्याच्या अतिप्रेमाचा परिणाम आहे.

८) 'बुअसिरा' म्हणजे कबरीतील मृतांना जिवंत करून, उठवून उभे केले जाईल.

९) हुस्सिला, म्हणजे मनातील गोष्टींना जाहीर करून, आणि उघड करून देण्यात येईल.

१०) म्हणजे जो अल्लाह त्यांना कबरींतून काढून घेईल, त्यांच्या मनांतील गुप्त भेद जाहीर करून टाकील, त्याच्या बाबतीत प्रत्येक मनुष्य जाणू शकतो की तो किती वाकबगार आहे ? आणि त्याच्यापासून कोणी गोष्ट गुप्त राहू शकत नाही. म्हणून मग तो प्रत्येकाला त्याच्या कर्माप्रमाणे चांगला किंवा वाईट मोबदला देईल. ही जणू त्या लोकांना तंबी आहे, जे अल्लाहच्या देणग्यांचा तर उपयोग घेतात; परंतु त्याचे आभार मानण्याऐवजी त्याच्याशी कृतघ्नता करतात. अशाच प्रकारे द्रव्याच्या प्रेमांत पडून, संपत्तीचे ते हक्क अदा करीत नाही, जे अल्लाहने त्याच्यांत दुसऱ्या लोकांचे ठेवले आहेत.

महावाक्ये ११ | **(१०१) सू. अल-कारिअ:** | रुकूअ १

ايَاتُهَا ١١ | (١٠١) سُوْرَةُ الْقَارِعَةِ مَكِّيَّةٌ (٣٠) | رُكُوْعُهَا ١

**परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो**

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

**धडका बसविणारी** (१)
اَلْقَارِعَةُ ۝١

**काय आहे[१] की धडका बसविणारी** (२)
مَا الْقَارِعَةُ ۝٢

**तुला काय ठाऊक की ती धडका बसविणारी काय आहे?** (३)
وَمَآ اَدْرٰىكَ مَا الْقَارِعَةُ ۝٣

**ज्या दिवशी मनुष्ये दाणादाण झालेल्या पतंगासारखे होऊन जातील[२]** (४)
يَوْمَ يَكُوْنُ النَّاسُ كَالْفَرَاشِ الْمَبْثُوْثِ ۝٤

**आणि पर्वत पिंजलेल्या रंगीत लोकरी सारखे होऊन जातील.[३]** (५)
وَتَكُوْنُ الْجِبَالُ كَالْعِهْنِ الْمَنْفُوْشِ ۝٥

**मग ज्याचे पारडे जड होईल.[४]** (६)
فَاَمَّا مَنْ ثَقُلَتْ مَوَازِيْنُهٗ ۝٦

**तो तर संतोषकारक जीवनांत असेल.[५]** (७)
فَهُوَ فِيْ عِيْشَةٍ رَّاضِيَةٍ ۝٧

**आणि ज्याचा तोल हलका होईल.[६]** (८)
وَاَمَّا مَنْ خَفَّتْ مَوَازِيْنُهٗ ۝٨

**त्याचे ठिकाण हाविय: होईल.[७]** (९)
فَاُمُّهٗ هَاوِيَةٌ ۝٩

**तुला काय ठाऊक की, ते काय आहे?[८]** (१०)
وَمَآ اَدْرٰىكَ مَا هِيَهْ ۝١٠

१) हे पण कयामतच्या नांवापैकी एक नाव आहे. जसे याच्यापूर्वी अनेक नांवे येऊन चुकली आहेत. उदाहरणार्थ अल्हाक:. अल्कारिअ: अल् ताम्मा, अल्साखत: अल् गाशिय: अस्साअत, अल् वाकिअ: वगैरे. अल् कारिअ: तिला यासाठी म्हणतात की, ही आपल्या भयानकतेमुळे अंत:करणाला जागवत आणि अल्लाहच्या शत्रुंना शिक्षेपासून सावध करून देईल. जसा दरवाजा ठोठावणारा करतो.

२) 'फिराश' मच्छर आणि दिव्याच्या अवतीभवती उडणारे पतंगे वगैरे. 'मब्सूस' पांगलेले. म्हणजे कयामतच्या दिवशी माणसे सुद्धा पतंगासारखे, परागंदा आणि पांगलेले असतील.

३) 'इह्न' त्या लोकरीला म्हणतात जी वेगवेगळ्या रंगाबरोबर, रंगलेली असेल. 'मनफूश' पिंजलेली. ही पर्वतांची ती स्थिती वर्णन केली आहे, जी कयामतच्या दिवशी त्यांची होईल. कुरआन करीममध्ये पर्वतांची ही स्थिती वेगवेगळ्या पद्धतीने सांगितली गेली आहे. ज्याचा तपशील पहिले येऊन चुकला. आतांपुढे त्या दोन पक्षांचा एकत्रित उल्लेख केला जात आहे जे कयामतच्या दिवशी कर्माच्या अनुषंगाने होतील.

४) 'मवाजीन' म्हणजे तराजु ज्यात कर्मपत्रे तोलली जातील. जसा की, याचा उल्लेख सू.आअराफ (आ.८) सू.कहफ (आ.१०५) आणि सू.अंबिया (४७) मध्ये सुद्धा आला आहे. काही म्हणतात की, येथे मिजान नाही. 'मव्जून' चे अनेकवचन आहे. म्हणजे अशी कर्मे ज्यांचे अल्लाहजवळ काही महत्त्व आणि खास वजन असेल. (फत्हुल कदीर) परंतु पहिला भावार्थच योग्य आणि बरोबर आहे. अर्थ हा आहे की, ज्यांची पुण्ये जास्त होतील, आणि कर्माच्या वजनाच्या वेळी, त्यांच्या पुण्याचे पारडे जड होऊन जाईल.

५) म्हणजे असे जीवन ज्याला जीवन जगणारा पसंद करेल.

६) म्हणजे ज्याची पापे, पुण्यापेक्षा जास्त होतील, आणि पापाचे पारडे जड आणि पुण्याचे हलके होईल.

७) 'हाविय:' नरकाग्नीचे एक नांव आहे. याला हाविय: यासाठी म्हणतात की, नर्कवासी याच्या खोलीत पडेल आणि त्याला 'उम्म' (आई) ने यासाठी संबोधित केले की ज्याप्रमाणे माणसाचे आश्रयस्थान त्याची आई असते. अशाच प्रकारे नर्कवासियांचे ठिकाण नरकाग्नी असेल. काही म्हणतात की, उम्मचा अर्थ मेंदुचा आहे. नर्कवासी नर्कात डोक्याकडून टाकले जातील. (इब्ने कसीर)

८) हे प्रश्न विचारणे त्याची भयानकता आणि शिक्षेच्या तिव्रतेला वर्णन करण्यासाठी आहे. की ते मनुष्याच्या अंदाज आणि कल्पनेच्या पलीकडे आहे. मनुष्याचे ज्ञान त्याला घेरू शकत नाही. आणि त्याची वास्तविक स्थिती जाणू शकत नाही.

نَارٌ حَامِيَةٌ ﴿١١﴾

ती धगधगीत प्रखर आग (आहे).[१] ११

## (१०२) सू. तकासुर

महावाक्ये ८ | रुकूअ १

(١٠٢) سُورَةُ التَّكَاثُرِ مَكِّيَّةٌ (١٦) آيَاتُهَا ٨ رُكُوعُهَا ١

بِسْمِ اللَّهِ الرَّحْمَٰنِ الرَّحِيمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

أَلْهَاكُمُ التَّكَاثُرُ ﴿١﴾

विपुलतेच्या हव्यासाने तुम्हांस गाफिल करून टाकले.[२] १

حَتَّىٰ زُرْتُمُ الْمَقَابِرَ ﴿٢﴾

येथ पावेतो की तुम्ही कबरस्थानांत पोहचून गेलात.[३] २

كَلَّا سَوْفَ تَعْلَمُونَ ﴿٣﴾

नाही! नाही!![४] तुम्हास लवकरच माहित होऊन जाईल. ३

ثُمَّ كَلَّا سَوْفَ تَعْلَمُونَ ﴿٤﴾

मग नाही! नाही!! तुम्हास माहित होऊन जाईल.[५] ४

كَلَّا لَوْ تَعْلَمُونَ عِلْمَ الْيَقِينِ ﴿٥﴾

असे नाही जर तुम्ही निश्चितपणे जाणत असता;[६] ५

لَتَرَوُنَّ الْجَحِيمَ ﴿٦﴾

तर नि:संशय तुम्ही नरकाग्नीस पाहून घ्याल.[७] ६

ثُمَّ لَتَرَوُنَّهَا عَيْنَ الْيَقِينِ ﴿٧﴾

आणि तुम्ही त्याला खात्रीच्या डोळ्याने पाहून घ्याल.[८] ७

ثُمَّ لَتُسْأَلُنَّ يَوْمَئِذٍ عَنِ النَّعِيمِ ﴿٨﴾

मग त्या दिवशी तुमच्याशी अवश्य देणग्यासंबंधी विचारणा केली जाईल.[९] ८

१) ज्याप्रमाणे हदीसमध्ये आहे की, मनुष्य जगात जी आग पेटवतो, ती नरकाग्नीच्या आगीचा सत्तरवा हिस्सा आहे. नरकाग्नीची आग जगांतील आगीच्या ६९ पट जास्त आहे. (स.बुखारी,स.मुस्लिम) एका हदीस मध्ये आहे की, ''आगीने आपल्या पालनकर्त्याजवळ तक्रार केली की, माझा एक हिस्सा, दुसऱ्या हिश्श्याला खात आहे. अल्लाहतआलाने तिला दोन श्वास घेण्याची परवानगी देऊन दिली. एक श्वास उन्हाळ्यांत आणि एक श्वास हिवाळ्यांत. तर जेव्हा कडक थंडी असते हा तिचा थंड श्वास आहे. आणि फार उष्णता असते, तो नरकाग्नीचा श्वास आहे.'' (स.बुखारी) एका आणखी हदीसमध्ये, नबी ﷺ नी फर्माविले, ''जेव्हा गर्मी सक्त असेल तर नामज थंडी करून पडा; यासाठी की गर्मीची तिव्रता नरकाग्नीच्या उफाळ्यामुळे आहे. (स.मुस्लिम)

२) 'अलहा' म्हणजे 'गाफील करून देणे.' 'तकासुर' आणखी आणखीची हांव. हे सर्व साधारण आहे. द्रव्य, संतती, पुष्कळसे हिमायती आणि मददगार आणि घराणे व कुटूंब वगैरे, सर्वांना शामील आहे. प्रत्येक ती वस्तू जिची विपुलता मनुष्याला प्रिय असेल. आणि विपुलतेला प्राप्त करण्याचा प्रयत्न आणि इच्छा त्याला अल्लाहकडून, त्याच्या हुकूमाकडून आणि परलोकाकडून गाफिल करून देईल. येथे अल्लाहतआला मनुष्याच्या त्या दुर्बलतेला सांगत आहे. ज्यांत मनुष्यांची बहुत्तायता, प्रत्येक काळी व्यस्त राहिली आहे.

३) याचा अर्थ आहे की, अधिक अधिक प्राप्त करण्यासाठी, श्रम करताकरता तुम्हास मृत्यू येऊन गेला आणि तुम्ही कबरीत जाऊन पोहचला.

४) म्हणजे तुम्ही ज्या अधिक अधिकची हांव, आणि अहंकारात व्यस्त आहात हे बरोबर नाही.

५) याचा परिणाम लवकरच तुम्ही जाणून घ्याल. हे ताकीद म्हणून दोनदा सांगितले.

✪ ६) याचे उत्तर महजुफ आहे. अर्थ आहे की जर तुम्ही या गफलतीचा परिणाम निश्चित जाणून घ्याल; ज्याप्रमाणे जगाच्या कोणी पाहिल्या सवरल्या वस्तुची तुम्हास खात्री होऊन जाते, तर तुम्ही नक्कीच या अधिक अधिकची हाव आणि यावर अहंकार करण्यात व्यस्त झाला नसता.

७) म्हणजे अल्लाहची शपथ! तुम्ही नरकाग्नी अवश्य पहाल. म्हणजे त्याची शिक्षा भोगाल.

८) पहिले पहाणे दुरून असेल. हे पहाणे जवळून असेल, म्हणून त्याला अयनुल् यकीन (ज्याची खात्री डोळ्यांनी पाहून होते) म्हटले गेले.

९) ही विचारणा त्या देणग्यांच्या बाबतीत होईल. ज्या अल्लाहने इहलोकांत प्रदान केल्या असतील. जसे डोळे, कान, मन, बुद्धी, शांती, आरोग्य, धनदौलत आणि संतती वगैरे. काही म्हणतात की, ही विचारणा फक्त काफिरांना होईल. काही म्हणतात की, प्रत्येकाला ही विचारणा होईल. कारण की निव्वळ विचारणे शिक्षेला पात्र नाही. ज्यांनी या देणग्यांचा उपयोग, अल्लाहच्या मार्गदर्शनानुसार केला असेल ते विचारणा केल्यावर सुद्धा शिक्षेपासून सुरक्षित राहतील. आणि ज्यांनी देणग्या प्रति कृतघ्नता दाखविली असेल ते (शिक्षेत) धरून घेतले जातील.

## (१०३) सू. अल-असर

महावाक्ये ३ — रुकूअ १

آياتها ٣ (١٠٣) سورة العصر مكية (١٣) ركوعها ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَالْعَصْرِ ۝١

**काळाची शपथ**[१] ①

اِنَّ الْاِنْسَانَ لَفِیْ خُسْرٍ ۝٢

**नि:संशय (खचित्च) मनुष्ये सर्वच्या सर्व तोट्यांत आहेत.**[२] ②

اِلَّا الَّذِیْنَ اٰمَنُوْا وَعَمِلُوا الصّٰلِحٰتِ وَتَوَاصَوْا بِالْحَقِّ ۙ۬ وَتَوَاصَوْا بِالصَّبْرِ ۝٣

**शिवाय त्या लोकांच्या, ज्यांनी ईमान आणले आणि चांगली कामे**[३] **केली, आणि (ज्यांनी) एकमेकांस सत्त्याची ताकीद केली;**[४] **आणि एकमेकास सहनशिलतेचा उपदेश केला.**[५] ③

## (१०४) सू. हुमज:

महावाक्ये ९ — रुकूअ १

آياتها ٩ (١٠٤) سورة الهمزة مكية (٣٢) ركوعها ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

وَیْلٌ لِّكُلِّ هُمَزَةٍ لُّمَزَةِ ۝١

**फारच तोटा आहे, प्रत्येक त्या माणसाला, जो टोमणे देतो आणि निंदा करतो.**[६] ①

الَّذِیْ جَمَعَ مَالًا وَّعَدَّدَهٗ ۝٢

**जो द्रव्य जमा करीत जातो आणि मोजून ठेवत जातो.**[७] ②

یَحْسَبُ اَنَّ مَالَهٗۤ اَخْلَدَهٗ ۝٣

**तो समजतो की त्याचे द्रव्य त्याचे जवळ सदासर्वदा राहील.**[८] ③

१) काळाने अभिप्रेत, रात्रंदिवसाचे हे जाणे येणे, आणि त्यांचे अदलून बदलून येणे आहे. रात्र येते तेव्हा अंध:कार आच्छादून जातो आणि दिवस उगवतो तेव्हा प्रत्येक वस्तू प्रकाशित होऊन जाते. याशिवाय कधी रात्र मोठी दिवस लहान, आणि कधी दिवस मोठा आणि रात्र लहान होऊन जाते. हाच दिवसांचा फेरबदल काळ आहे. जो अल्लाहचे सामर्थ्य आणि कौशल्यावर प्रामाण्य करतो. म्हणूनच अल्लाहने याची शपथ वाहिली आहे. हे पूर्वी सांगून टाकण्यांत आले आहे की, अल्लाहतआला तर आपल्या सृष्टीतून ज्याची इच्छील त्याची शपथ खाऊं शकतो; परंतु माणसांकरीता अल्लाहच्या शपथेशिवाय कोणाची शपथ खाणे योग्य नाही.

२) हे शपथेचे उत्तर आहे. मनुष्याचा तोटा आणि गारद होणे स्पष्ट आहे की, जोपर्यंत तो जिवंत रहातो त्याचे रात्रंदिवस फारच काबाड कष्ट करण्यांत चालले जातात. मग जेव्हांत्याला मृत्यू येतो, तेव्हा त्याला मृत्यूनंतर सुद्धा आराम आणि सुख नशिबी येत नाही. किंबहुना तो नरकाग्नीचे इंधन बनतो.

३) होय! परंतु या तोट्यापासून ते लोक सुरक्षित आहेत, जे ईमान आणि चांगली कामे करण्यांत परिपूर्ण आहेत. कारण की त्यांचे जीवन कसे का जाईना! मृत्यूनंतरच्या नंतर ते कुठल्याही परिस्थितीत ते कायमच्या आनंदात आणि स्वर्गाच्या सुखासमाधानाच्या जीवनाने लाभान्वीत होतील. पुढे ईमानवाल्यांच्या आणखी वैशिष्ट्यांची चर्चा आहे.

४) म्हणजे अल्लाहच्या धर्मशास्त्राचे अनुपालन, आणि निषीद्ध गोष्टींपासून आणि पापांपासून वांचण्याची ताकीद.

५) म्हणजे आपत्तीत आणि संकटात सहन करणे, धर्मशास्त्राचे आदेश हुकूम याच्यावर कर्म करतांना सहन करणे. गुन्ह्यांपासून वांचण्यांत सहन करणे, चवी आणि मनोकामनाच्या त्यागावर सहन करणे, सहनशिलता जरी एक दुसऱ्याला सहनशिलता अंगीकारण्याच्या उपदेशात शामील आहे, तथापि तिचा विशेष म्हणून वेगळा उल्लेख केला गेला. ज्यामुळे तिचे महत्त्व, प्रतिष्ठा आणि सत्य होण्यांत तिचे श्रेष्ठ होणे स्पष्ट आहे.

✿ ६) हुमज: आणि लुमज: काहींच्या जवळ समानअर्थी आहेत. काही याच्यांत काही फरक करतात. हुमज: तो मनुष्य आहे जो तोंडावर वाईट बोलेल आणि लुमज: जो पाठीमागे निंदा करेल. काही याच्या उलट अर्थ करतात. काही म्हणतात हुमज: डोळे आणि हाताने इशारे करून वाईटपणा करणे आणि लम्ज जिभेने.

७) याच्याने अभिप्रेत तेच आहे की, गोळा करणे आणि मोजून मोजून ठेवणे. म्हणजे सांभाळून सांभाळून ठेवणे; आणि त्याला अल्लाहच्या मार्गात खर्च न करणे. नाही तर तसे पाहता द्रव्य जमा करून ठेवणे निंदनीय नाही हे निंदनीय त्यावेळी आहे, जेव्हा जकात, दानधर्म आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करणे, याची काळजी न घेतली जाईल.

८) 'अख्लद:' चे जास्त बरोबर भाषांतर हे आहे की, ''त्याला नेहमी जिवंत ठेवील.'' म्हणजे हे द्रव्य ज्याला तो जमा करून ठेवतो, त्याच्या आयुष्यांत वाढ करून देईल आणि त्याला मरू देणार नाही.

كَلَّا لَيُنْۢبَذَنَّ فِي الْحُطَمَةِ ﴿٤﴾

नाही! नाही!! [१] हा, तर तोड फोड करणाऱ्या आगीत फेंकून देण्यात येईल. [२] ④

وَمَآ اَدْرٰىكَ مَا الْحُطَمَةُ ﴿٥﴾

आणि तू काय समजलास की, अशी आग काय आहे? [३] ⑤

نَارُ اللّٰهِ الْمُوْقَدَةُ ﴿٦﴾

ती अल्लाहतआलाची पेटवलेली आग असेल. ⑥

الَّتِيْ تَطَّلِعُ عَلَى الْاَفْـِٕدَةِ ﴿٧﴾

जी हृदयापर्यंत चढत चालली जाईल [४] ⑦

اِنَّهَا عَلَيْهِمْ مُّؤْصَدَةٌ ﴿٨﴾

आणि त्यांच्यावर मोठ्या मोठ्या स्तंभात ⑧

فِيْ عَمَدٍ مُّمَدَّدَةٍ ﴿٩﴾

चोहोकडून बंद केलेली असेल. [५] ⑨

## (१०५) सू. फील

महावाक्ये ५ | रुकूअ १

(١٠٥) سُوْرَةُ الْفِيْلِ مَكِّيَّةٌ (١٩) — اٰيَاتُهَا ٥ — رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اَلَمْ تَرَ كَيْفَ فَعَلَ رَبُّكَ بِاَصْحٰبِ الْفِيْلِ ﴿١﴾

काय तू पाहिले नाहीस, की तुझ्या पालनकर्त्याने हत्तीवाल्यांबरोबर काय केले? [६] ①

اَلَمْ يَجْعَلْ كَيْدَهُمْ فِيْ تَضْلِيْلٍ ﴿٢﴾

काय त्यांच्या डावपेंचाला बेकार करून टाकले नाही? [७] ②

وَّاَرْسَلَ عَلَيْهِمْ طَيْرًا اَبَابِيْلَ ﴿٣﴾

आणि त्यांच्यावर पांखराचे थवेच्या थवे पाठविले. [८] ③

تَرْمِيْهِمْ بِحِجَارَةٍ مِّنْ سِجِّيْلٍ ﴿٤﴾

जे त्यांना कंकराचे खडे मारीत होते. [९] ④

فَجَعَلَهُمْ كَعَصْفٍ مَّاْكُوْلٍ ﴿٥﴾

येथ पावेतो की, त्यांना खाल्लेल्या भुशाप्रमाणे (तळपट) करून टाकले. [१०] ⑤

## (१०६) सू. कुरैश

महावाक्ये ४ | रुकूअ १

(١٠٦) سُوْرَةُ قُرَيْشٍ مَكِّيَّةٌ (٢٩) — اٰيَاتُهَا ٤ — رُكُوْعُهَا ١

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

لِاِيْلٰفِ قُرَيْشٍ ﴿١﴾

कुरैशला आवड लावण्याच्या आभारांत ①

اٖلٰفِهِمْ رِحْلَةَ الشِّتَآءِ وَالصَّيْفِ ﴿٢﴾

(म्हणजे) त्यांना हिवाळा आणि उन्हाळ्याच्या प्रवासाची सवय लावली [११] ②

فَلْيَعْبُدُوْا رَبَّ هٰذَا الْبَيْتِ ﴿٣﴾

(त्याच्या आभारांत) त्यांना पाहिजे की, या घराच्या पालनकर्त्याची उपासना करावी ③

الَّذِيْٓ اَطْعَمَهُمْ مِّنْ جُوْعٍ ۙ وَّاٰمَنَهُمْ مِّنْ خَوْفٍ ﴿٤﴾

ज्याने त्यांना भुकेत खावयांस दिले; [१२] आणि भीतीपासून त्यांना सुरक्षित केले. [१३] ④

१) म्हणजे मामला असा नाही, जशी त्याची कल्पना आणि गुमान आहे.

२) म्हणजे असा कंजुष मनुष्य 'हुतम:' मध्ये फेकून देण्यात येईल. हे पण नरकाग्नीचे एक नाव आहे. 'तोडून फोडून टाकणारी.'

३) हे प्रश्न विचारणे त्याच्या भयानकतेला वर्णन करण्यासाठी आहे. म्हणजे ती एवढी भयानक आग असेल की तुमच्या जाणीवा तिची कल्पना करू शकत नाही. आणि तुमची बुद्धी आणि समज तिच्या तळापर्यंत पोहचू शकत नाही.

४) म्हणजे तिची उष्णता हृदयापर्यंत पोहचून जाईल. जगांतील आगीच्या ठाईपण हे वैशिष्टय आहे की, ती प्रत्येक वस्तुला जाळून टाकते. परंतु, जगांत ही आग हृदयापर्यंत पोहचूशकत नाही की, मनुष्याचा मृत्यू त्यापूर्वीच होऊन जातो. नरकाग्नीत असे होणार नाही. ती आग हृदयापर्यंत पण पोहचेल, पण मृत्यू येणार नाही, किंबहुना आकांक्षा

करून सुद्धा मृत्यू येणार नाही.
५) 'मूसद:' चा अर्थ बंद म्हणजे नरकाग्नीचे दरवाजे आणि रस्ते बंद करून दिले जातील. की, कोणी बाहेर निघूंशकूं नये. आणि त्यांना लोखंडाच्या मेखांशी बांधून देण्यांत येईल, ज्या उंच खांबांसारख्या असतील. काहींच्या जवळ 'अमद' ने अभिप्रेत बेड्या किंवा मानखोडे आहेत. आणि काहींच्या जवळ खांब आहेत, ज्यांत त्यांना शिक्षा दिली जाईल. (फत्हूल कदीर)
६) जे यमनहून खाना-ए-काबा पाडून टाकण्यासाठी आले होते. काय तुला ठाऊक नाही? म्हणजे तू जाणतो किंवा ते सर्व लोक जाणतात, जे तुझ्या काळांतील आहेत . हे यासाठी सांगितले की, अरबस्थानांत ही घटना घडून अजून फार काळ उलटलेला नव्हता. प्रसिद्ध कथनानुसार, ही घटना त्यावर्षी घडली, ज्यावर्षी नबी ﷺ चा जन्म झाला होता. म्हणून अरबांमध्ये याच्या बातम्या मशहूर आणि सतत चालू होत्या. ही घटना थोडक्यात खालीलप्रमाणे आहे.

असहाबे फीलची घटना

हबशाच्या बादशाहच्या वतीने 'अब्रहतुल् अस्रम्' यमन मध्ये गव्हर्नर होता. त्याने सन्आमध्ये एक फार मोठे चर्च (उपासना गृह) बांधले. आणि प्रयत्न केला की, लोकांनी खाना-ए-काबाच्या ऐवजी उपासना आणि हज उमरासाठी इकडे येत जावे. ही गोष्ट मक्केवाल्यांसाठी आणि दुसऱ्या अरब टोळ्यांसाठी फारच असह्य होती. म्हणून यांच्यातून एका माणसाने अबरह:च्या बनविलेल्या उपासनागृहाला घाणीने पलीद करून टाकले. ज्याची सूचना त्याला करून देण्यांत आली की, कोणीतरी चर्चला अशाप्रकारे अपवित्र करून टाकले आहे. ज्यामुळे त्याने खाना-ए-काबाला ढासळवून टाकण्याचा इरादा करून घेतला. आणि एक फार मोठे लष्कर घेऊन मक्केवर हल्ला करण्यासाठी निघाला. काही हत्तीपण त्याच्या बरोबर होते. जेव्हा हे सैन्य महास्सिरच्या घाटीत पोहचले, तेव्हा अल्लाहतआलाने पाखरांचे थवेच्या थवे पाठवून दिले ज्यांच्या चोचीत आणि पायांच्या पंज्यात खडे होते. जे हरबरे किंवा मसूरच्या बरोबर होते. ज्या सैनिकाला पण हा खडा लागे तो पिघळून जाई आणि त्यांचे मास झडून जाई आणि तो सरशेवटी मरून जाई.स्वत: अबर्ह:चा पण सनआ पोहचता पोहचता हाच शेवट झाला. अशाप्रकारे अल्लाहने आपल्या घराचे संरक्षण केले. मक्केच्या जवळ पोहचून अबरह:च्या सैन्याने नबी ﷺ च्या आजोबांचे जे मक्केचे सरदार होते उंटावर कब्जा करून घेतला. ज्यावर अब्दुल मुत्तालिबने (आजोबा) येऊन अबरह:ला म्हटले की, तू माझे उंट परत करून दे, जे तुझ्या सैनिकांनी पकडले आहेत. बाकी राहिली खाना-ए-काबाची समस्या, ज्याला ढासळवून टाकण्यासाठी तू आला आहे. तर तो तुझा मामला अल्लाहशी आहे. ते त्याचे घर आहे. तोच त्याचा संरक्षणकर्ता आहे. तू जाणो आणि बैतुल्लाहचा मालक अल्लाह जाणो ! (अयसरुत तफासीर)
७) म्हणजे तो जो खाना-ए-काबाला ढासळून टाकण्याचा इरादा घेऊन आला होता, त्यांत त्याला अपयशी करून टाकले.
८) 'अबाबील' पक्ष्याचे नांव नाही. परंतु त्याचा अर्थ आहे, झुंड चे झुंड.
९) 'सिज्जील' मातीला आगीत भाजून त्यापासून बनविलेले दगड. या छोट्या छोट्या दगड किंवा कंकरांनी, तोफेचे गोळे आणि बंदुकीच्या गोळ्यापेक्षा जास्त विनाशकारी काम केले.
१०) म्हणजे त्यांच्या शरीराचे अवयव अशा प्रकारे पांगून पडले, जसा खाल्लेला भुसा असतो.
११) 'ईलाफ' चा अर्थ आहे, परिचीत आणि कुठल्या गोष्टींवर आधिन होणे, म्हणजे या कामापासून त्रास आणि चीड दूर होऊन जाणे. कुरैशच्या निर्वाहाचे साधन व्यापार होता. वर्षातून त्यांचा दोन वेळा व्यापारी काफला बाहेर जाई आणि तेथून व्यापारी माल घेऊन येई. हिवाळ्यांत यमन जो उष्ण इलाखा होता, आणि उन्हाळ्यात सीरियाकडे, जो थंडप्रदेश होता. खाना-ए-काबाचे सेवक असल्यामुळे सर्व अरबवासी त्यांचा आदर करीत असत. म्हणून त्यांचे काफले कुठल्याही प्रतिबंधाशिवाय, प्रवास करीत. अल्लाहतआला या अध्यायांत कुरैश लोकांना सांगत आहे की, तुम्ही जो उन्हाळ्यात हिवाळ्यांत प्रवास करतात, तर या आमच्या उपकारामुळे, की आम्ही, तुम्हास मक्केत शांतता प्रदान केली आणि अरबवासियांमध्ये सन्माननीय बनविले आहे. जर अशी गोष्ट नसती, तर तुमचा प्रवास शक्य झाला नसता. आणि हत्तीवाल्यांना सुद्धांआम्ही याचसाठी नष्ट केले आहे की, तुमची प्रतिष्ठा पण कायम रहावी, आणि तुमच्या प्रवासाचा क्रमपण चालू रहावा, ज्याची तुम्हास पण संवय आहे, तो कायम रहावा. जर अबर्हा: आपल्या निंदनीय उद्देश्यांत सफल झाला असतां, तर तुमची प्रतिष्ठा आणि सरदारी पण संपून गेली असती. प्रवासाचा क्रम पण खंडित होऊन जाता. म्हणून तुम्हास पाहिजे की फक्त या बैतुल्लाहच्या स्वामीची उपासना करावी.
१२) चर्चित व्यापार आणि प्रवासाच्या मार्फत.
१३) अरबस्थानांत ठार मारणे आणि लुटमार सर्रास होती. परंतु मक्केच्या कुरैश लोकांना मक्केच्या पावित्र्यामुळे जो

महावाक्ये ७ | रुकूअ १

# (१०७) सू. माऊन

آیاتها ٧ (١٠٧) سُوْرَةُ الْمَاعُوْنِ مَكِّيَّةٌ (١٧) رکوعها ١

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

काय तू (त्याला पण) पाहिलेस, जो निर्णयाच्या दिवसांस खोटे ठरवतो.[१] (१)

اَرَءَيْتَ الَّذِيْ يُكَذِّبُ بِالدِّيْنِ ۝١

हा तोच आहे, जो अनाथाला धक्के देत असतो.[२] (२)

فَذٰلِكَ الَّذِيْ يَدُعُّ الْيَتِيْمَ ۝٢

आणि गोर गरीबांस जेऊ घालण्याचे प्रोत्साहन देत नाही.[३] (३)

وَلَا يَحُضُّ عَلٰى طَعَامِ الْمِسْكِيْنِ ۝٣

तर अशा नमाज पढणाऱ्याकरीता खेद आहे, (आणि 'वैल' नामक नरकाग्नीत जागा) (४)

فَوَيْلٌ لِّلْمُصَلِّيْنَ ۝٤

जे आपल्या नमाजीकडून गाफील आहेत.[४] (५)

الَّذِيْنَ هُمْ عَنْ صَلَاتِهِمْ سَاهُوْنَ ۝٥

जे दिखावा करतात. (६)

الَّذِيْنَ هُمْ يُرَآءُوْنَ ۝٦

आणि रोजच्या वापरण्याच्या वस्तू (देण्यास) नाकारतात.[६] (७)

وَيَمْنَعُوْنَ الْمَاعُوْنَ ۝٧

✪ या अध्यायाला सू.द्वीन, सू.अरअयत् व सू.यतीम पण म्हणतात (फत्हुल कदीर)

१) रसूलुल्लाह सल्लल्लाहू अलैहि व सल्लमला संबोधन आहे आणि प्रश्न करण्याचा उद्देश्य आश्चर्य व्यक्त करणे आहे. रूईयत ओळखून घेण्याच्या भावार्थात आहे आणि 'द्वीन' ने अभिप्रेत परलोकाचा हिशेब आणि त्याचा मोबदला आहे. मूळ परीच्छेद आहे, ''काय तू त्या माणसाला ओळखले जो निर्णयाच्या दिवसाला खोटे ठरवतो? काय तो आपल्या गोष्टीत बरोबर आहे की चूक?''

२) यासाठी की एक तर कंजुष आहे. दुसरा कयामतला नाकारणारा आहे. बरे! असा मनुष्य अनाथांबरोबर का म्हणून चांगली वागणुक करू शकतो? अनाथाबरोबर तोच मनुष्य चांगली वागणुक ठेवेल, ज्याच्या मनांत धनाच्या ऐवजी, माणसांची कदर, आणि चारित्र्य संवर्धाचे महत्त्व आणि प्रेम असेल. दुसरे, त्याला या गोष्टीची खात्री असावी की याच्या बदल्यांत मला कयामतच्या दिवशी चांगला मोबदला मिळेल.

३) हे काम पण तोच करेल, ज्यांत चर्चित खुब्या असतील. नाहीतर हा अनाथा सारखा गोरगरीबाला सुद्धा धक्काच मारेल.

४) याच्याने ते लोक अभिप्रेत आहेत, जे नमाज एक तर पढतच नाही, किंवा पूर्वी पढत राहिले आहेत. मग आळसावून गेलेत. किंवा नमाजीला आपल्या ठरलेल्या वेळेवर पढत नाही. जेव्हा मनात येते, पढून घेतात किंवा नेहमीच उशीरा पढतात. किंवा नम्रता आणि व्याकुळतेने पढत नाहीत. हे सर्व भावार्थ यांत येऊन जातात. म्हणून नमाजीच्या या चर्चित सर्व कोताईपासून वांचले पाहिजे येथे या ठिकाणी उल्लेख करण्याने हे पण स्पष्ट आहे की, नमाजीमध्ये या कोताया करणारे तेच लोक असतात, जे परलोकातील मोबदला आणि हिशेब घेतला जाण्यावर विश्वास ठेवित नाही. म्हणून दांभिकांचे एक वैशिष्ट्य हे पण सांगण्यांत आले आहे, ''आणि जेव्हा नमाजीला उभे रहातात, तर फारच आळसावलेल्या स्थितीत उभे रहातात. फक्त लोकांना दाखवतात, आणि अल्लाहचे स्मरण तर असेच नांवापुरते करतात.'' (सू.निसाअ-१४२)

४) म्हणजे अशा लोकांची रीतच अशी असते की, लोकांबरोबर असेल तर नमाज पढून घेतली, नाही तर नमाज पढण्याची आवश्यकताच समजत नाही. म्हणजे फक्त नमाज, दाखविण्यासाठी आणि डामडौलसाठी पढतात.

६) 'मअनुन' थोड्या वस्तूला म्हणतात. काही याच्याने अभिप्रेत जकात घेतात. कारण की ती पण मूळ धनाच्या तुलनेत, फारच थोडीशी असते. (अडीच टक्के) आणि काही याच्याने घरात वापरण्याच्या वस्तू अभिप्रेत घेतात, जे शेजारी एक दुसऱ्याकडे तात्पुरत्या स्वरुपांत मागतात. अर्थ हा झाला की, घरगुती वापराच्या वस्तू उसनवार देऊन देण्यात दु:ख न वाटणे, चांगले वैशिष्ट्य आहे. आणि याच्या उलट कृपणपणा आणि कंजुषी दाखविणे ही कयामतला नाकारणाऱ्यांचीच पद्धत आहे.

## (१०८) सू. अल–कौसर

महावाक्ये ३ | रुकूअ १

اٰيَاتُهَا ٣ (١٠٨) سُوْرَةُ الْكَوْثَرِ مَكِّيَّةٌ (١٥) رُكُوْعُهَا ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

إِنَّآ أَعْطَيْنٰكَ الْكَوْثَرَ ۝١

खचितच आम्ही तुला (हौजे) कौसर (आणि पुष्कळ काही) दिले आहे[१] ①

فَصَلِّ لِرَبِّكَ وَانْحَرْ ۝٢

तर तूंआपल्या पालनकर्त्याकरीता नमाज पढ आणि कुरबानी कर[२] ②

إِنَّ شَانِئَكَ هُوَ الْأَبْتَرُ ۝٣

नि:संशय तुझा शत्रुच निर्वंश आहे.[३] ③

## (१०९) सू. अल–काफिरुन

महावाक्ये ६ | रुकूअ १

اٰيَاتُهَا ٦ (١٠٩) سُوْرَةُ الْكٰفِرُوْنَ مَكِّيَّةٌ (١٨) رُكُوْعُهَا ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

قُلْ يٰٓأَيُّهَا الْكٰفِرُوْنَ ۝١

आपण सांगून टाका की, हे काफिरांनो![४] ①

لَآ أَعْبُدُ مَا تَعْبُدُوْنَ ۝٢

न मी त्याची उपासना करीन ज्याची तुम्ही उपासना करता ②

✪ याचे दुसरे नांव सू. नहर सुद्धा आहे.

१) कौसर कसरतपासून आहे. याचे अनेक अर्थ सांगितले गेले आहे. इब्ने कसीरने ''खैरे कसीर'' (भलाईची विपुलता) च्या भावार्थाला प्राधान्य दिले आहे. कारण की, याच्यांत असे सर्वसाधारण आहे की, ज्याच्यात दुसरे अर्थपण येऊन जातात. उदाहरणार्थ सही हदीशीमध्ये सांगण्यात आले आहे की, याच्याने एक पाण्याचा पाट अभिप्रेत आहे जो आपणांस ﷺ स्वर्गांत प्रदान करण्यात येईल. अशाच प्रकारे काही हदीशींमध्ये याला हौद म्हणण्यांत आले आहे. ज्याच्याने ईमानवाले स्वर्गांत जाण्यापूर्वी नबी ﷺ च्या शुभ हस्ते पाणी पितील. या हौदामध्ये पाणी याच स्वर्गातील पाटापासून येत असेल. अशाच प्रकारे ऐहिक विपुलता आणि आपण ﷺ ची महानता आणि नेहमी उल्लेख करणे, आणि परलोकातील मोबदला आणि पुण्यप्रतिफल, सर्वच गोष्टी 'खैरे कसीर' मध्ये येऊन जातात. (इब्ने कसीर)

२) म्हणजे नमाजपण फक्त एका अल्लाहकरीता आणि कुरबानी सुद्धा फक्त एका अल्लाहच्या नांवावर. मुशरिक लोकांप्रमाणे याच्यांत दुसऱ्यांना शामील करू नकोस. नहर चा मूळ अर्थ आहे, उंटाच्या खोलगट भागांत भाला किंवा सुरी मारून, त्याला जबाह करणे. दुसऱ्या जनावरांना जमिनीवर झोपवून, त्यांच्या गळ्यावर सुरी फिरविली जाते. त्याला जबाह करणे म्हणतात. परंतु येथे 'नहर' ने अभिप्रेत कुरबानी आहे. याशिवाय याच्यांत दानधर्म म्हणून जनावर कुरबान करणे, हजच्या प्रसंगी मिनामध्ये, इदुज् जुहाच्या प्रसंगी कुरबानी करणे, सर्व शामील आहेत.

३) 'अब्तर' अशा माणसाला म्हणतात, ज्याचा वंश खंडीत झाला असावा, म्हणजे त्याच्या व्यक्तीत्वावरच, त्याच्या वंशाचा शेवट होऊन जावा. किंवा त्याचे नांव घेणारा न राहील. जेव्हा नबी ﷺ ची नर संतती बाकी राहिली नाही; तेव्हा काही काफिरांनी आपण ﷺ ला 'अब्तर' म्हटले. ज्यावर अल्लाहतआलाने आपली सांत्वना केली. 'अब्त्र' तू नाही, तुझे शत्रु राहतील. तथापि अल्लाहतआलाने आपल्या वंशाला पण बाकी ठेवले जरी याचा क्रम मुलगी कडूनच आहे. अशाचप्रकारे आपली उम्मत सुद्धा अर्थाच्या दृष्टीने आपली संततीच आहे. जिच्या विपुलतेवर आपण ﷺ कयामतच्या दिवशी अभिमान करतील. याशिवाय आपण ﷺ चे स्मरण साऱ्या जगांत फारच आदर सन्मानाने केले जाते. जेव्हा की आपला द्वेष आणि तिरस्कार करणारे, फक्त इतिहासाच्या पानांतच आढळून येतात. परंतु कोणत्याही अंत:करणांत त्यांचा आदर नाही. आणि कोणाच्या मुखाने त्यांचा चांगला उल्लेख नाही.

✪ सहीह हदीशींनी सिद्ध आहे की, रसूलुल्लाह ﷺ तवाफच्या दोन रकातीमध्ये आणि फज्र आणि मगरीबच्या सुन्नतीमध्ये, कुल् या अय्युहल् काफिरून आणि सू.इखलास पढत असत. अशाचप्रकारे आपण काही सहाबांना फर्माविले की, रात्री झोपतेवेळी, हा अध्याय पढून झोपाल, तर शिर्कपासून मुक्त होण्यास पात्र ठराल. (मुसनद अहमद २५६/५, तिर्मिझी क्र.३४०३, अबुदाऊद क्र.५०५५) काही रिवायतीमध्ये, स्वत: आपण ﷺ रात्रीच्या वेळी ही सूरह पढत असत. (इब्ने कसीर)

४) येथे विशेष म्हणून फक्त त्या काफिरांना संबोधन आहे, ज्यांच्या बाबतीत अल्लाहला ठाऊक होते की, यांचा शेवट कुफ्र आणि शिर्कवर होईल. कारण की या अध्यायाच्या प्रकटीकरणानंतर, कित्येक मुशरिक लोक मुसलमान होऊन गेलेत. आणि त्यांनी (फक्त एका) अल्लाहची उपासना केली. (फतहुल कदीर)

وَلَآ اَنۡتُمۡ عٰبِدُوۡنَ مَاۤ اَعۡبُدُ ۚ﴿۳﴾

न तुम्ही त्याची उपासना करणार, ज्याची मी उपासना करतो ③

وَلَاۤ اَنَا عَابِدٌ مَّا عَبَدۡتُّمۡ ۙ﴿۴﴾

आणि न मी उपासना करणार . ज्याची तुम्ही उपासना करत आहात ④

وَلَاۤ اَنۡتُمۡ عٰبِدُوۡنَ مَاۤ اَعۡبُدُ ؕ﴿۵﴾

आणि न तुम्ही त्याची उपासना कराल, ज्याची मी उपासना करीत आहे.[1] ⑤

لَكُمۡ دِيۡنُكُمۡ وَلِىَ دِيۡنِ ﴿۶﴾

(ع १ ६ ३४) तुमच्या करीता तुमचा धर्म आहे आणि माझ्याकरीता माझा धर्म आहे.[2] ⑥

## (११०) सू. नस्र

महावाक्ये ३ — रुकूअ १

(۱۱۰) سُوۡرَةُ النَّصۡرِ مَدَنِيَّةٌ (۱۱۴) — اٰيَاتُهَا ۳ — رُكُوۡعُهَا ۱

بِسۡمِ اللّٰهِ الرَّحۡمٰنِ الرَّحِيۡمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

اِذَا جَآءَ نَصۡرُ اللّٰهِ وَالۡفَتۡحُ ۙ﴿۱﴾

जेव्हा अल्लाहची मदत आणि विजय येऊन पोहचेल. ①

وَرَاَيۡتَ النَّاسَ يَدۡخُلُوۡنَ فِىۡ دِيۡنِ اللّٰهِ اَفۡوَاجًا ۙ﴿۲﴾

आणि तू लोकांना अल्लाहच्या धर्मांत, घोळकेच्या घोळके येतांना पाहशील.[3] ②

فَسَبِّحۡ بِحَمۡدِ رَبِّكَ وَاسۡتَغۡفِرۡهُ ؔؕ اِنَّهٗ كَانَ تَوَّابًا ﴿۳﴾

तू आपल्या पालनकर्त्याच्या पावित्र्य वर्णन आणि स्तुती करण्यांत लागून रहा; आणि त्याच्याशी क्षमेची प्रार्थना कर; नि:संशय तो मोठाच प्रायश्चित्त मान्य करणारा आहे.[4] ③ (ع १ ३ ३५)

१) येथे ताकीद करण्यासाठी हे वाक्य दोनदा सांगण्यात आले आहे. उद्देश्य हा आहे की, हे कधी शक्य नाही की, मी एकेश्वरवादाचा मार्ग सोडून शिर्कचा मार्ग अंगीकारून घेईल. जसे की तुम्ही इच्छितात. आणि जर अल्लाहने तुमच्या नशिबी हिदायत लिहलेली नाही, तर तुम्ही सुद्धा एकेश्वरवाद आणि अल्लाहच्या उपासनेपासून वंचित्‌च राहाल. ही गोष्ट त्यावेळी सांगितली गेली जेव्हा काफिरांनी ही व्यवस्था पुढे केली की, एक वर्ष आम्ही तुमच्या उपास्याची आणि एक वर्ष तुम्ही आमच्या उपास्यांची उपासना करावी.

२) म्हणजे जर तुम्ही आपल्या धर्मावर राजी आहांत, आणि त्याला सोडण्यासाठी तयार नाही, तर मी (सुद्धा) माझ्या धर्मावर राजी आहे. मी त्याला का म्हणून सोडावे? लना अअ्मालुना व लकुम् अअ्मा लुकुम् (सू.कसस-५५) ''आमच्यासाठी आमचे कर्म आणि तुमच्यासाठी तुमचे कर्म.''

✪ अवतरणाच्या अनुषंगाने हा शेवटचा अध्याय आहे. (स.मुस्लिम किताबुल तफसीर) ज्यावेळी हा अध्याय अवतरीत झाला. तेव्हा काही सहाबा ﷺ समजून गेले की, आता नबी ﷺ ची शेवटची वेळ येऊन ठेपली आहे. म्हणूनच आपणांस अल्लाहचे पावित्र्य वर्णन, स्तुती आणि क्षमायाचनेचा हुकूम देण्यात आला आहे. जसे ह.इब्ने अब्बास ﷺ आणि ह.उमर ﷺ ची गोष्ट सहीह बुखारी मध्ये आहे. (तफसीर सू.नस्र)

३) अल्लाहच्या मदतीचा अर्थ, इस्लाम आणि मुसलमानांचे कुफ्र आणि काफिरांवर वर्चस्व आहे. आणि विजयाने अभिप्रेत मक्केचा विजय आहे. जे नबी ﷺ चे जन्मस्थळ आणि रहाण्याचे ठिकाण होते. परंतु काफिरांनी आपणास आणि सहाबांस, तेथून स्वदेश त्याग करण्यास भाग पाडले होते. म्हणून जेव्हा ८ हिजरी मध्ये, या मक्केवर विजय मिळविण्यांत आला तेव्हा लोक झुंडीच्या झुंडी इस्लाममध्ये दाखल होणे सुरू होऊन गेले. जेव्हा की, याच्या पूर्वी एक एक दोन दोन माणसे मुसलमान होत असत. मक्केच्या विजयाने, लोकांवर ही गोष्ट बिल्कुल स्पष्ट होऊन गेली की, आपण अल्लाहचे खरे पैगंबर आहांत. आणि इस्लाम धर्म, सत्य धर्म आहे. ज्याच्याशिवाय आता परलोकांतील मुक्ती शक्य नाही. अल्लाहतआलाने फर्माविले जेव्हा असे होईल.

४) म्हणजे हे समजून घ्यावे की, पैगंबरीचा प्रचार आणि सत्य स्पष्ट करून देण्याचे कर्तव्य जे तुझ्यावर जबाबदारी म्हणून होते, पूर्ण होऊन गेले आणि आता तुझे जगातून चालले जाण्याचा प्रसंग, जवळ येऊन ठेपलेला आहे. म्हणून अल्लाहची स्तुती, पावित्र्य वर्णन आणि क्षमायाचना यांची खूप काळजी घे ! याच्याने ठाऊक झाले की, जीवनाच्या शेवटच्या दिवसांत, या गोष्टींची भरपूर काळजी घेतली गेली पाहिजे.

महावाक्ये ५ | رُكُوعُهَا ١ | آياتها ٥ | (١١١) سُوْرَةُ اللَّهَبِ مَكِّيَّةٌ (٦) | रुकूअ १

# (१११) सू. लहब

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

परम दयाळू आणि कृपाळू
अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

**अबुलहब चे दोन्ही हात तुटून गेले आणि तो (स्वत:) नाश पावला[१] ①** | تَبَّتْ يَدَآ اَبِىْ لَهَبٍ وَّتَبَّ ۝١

**न तर त्याचे धन त्याच्या काही कामा आले, न त्याची कमाई[२] ②** | مَآ اَغْنٰى عَنْهُ مَالُهٗ وَمَا كَسَبَ ۝٢

**तो लवकर (च) भडकणाऱ्या आगीत जाऊन दाखल होईल. ③** | سَيَصْلٰى نَارًا ذَاتَ لَهَبٍ ۝٣

**आणि त्याची बायको सुद्धा (जाईल), जी लांकडे वाहून आणते.[३] ④** | وَّامْرَاَتُهٗ ۭ حَمَّالَةَ الْحَطَبِ ۝٤

**तिच्या गळ्यांत, खजुरीच्या तंतुची पीळ दिलेली दोरी असेल.[४] ⑤** | فِيْ جِيْدِهَا حَبْلٌ مِّنْ مَّسَدٍ ۝٥

✪ याला सू. मसद पण म्हणतात. याच्या अवतरणाच्या कारणांत येते की, जेव्हा नबी ﷺ ला हुकूम झाला की, आपल्या नातेवाईकांना भिववा आणि धर्मप्रचार करावा. तेव्हा आपण (सल्ल.) नी सफा डोंगरावर चढून 'या सबाहाहु' चा आवाज दिला. अशा प्रकारचा आवाज धोक्याची निशाणी समजली जाते. म्हणून या आवाजावर लोक एकत्रित होऊन गेले. आपण (सल्ल.) फर्माविले, जरा सांगा! जर मी तुम्हास बातमी देईन की, या डोंगराच्या मागे एक घोडेस्वार लष्कर आहे, जे तुमच्यावर हल्ला करू इच्छते, तर तुम्ही मला याबाबतीत मान्य कराल? ते म्हणाले का नाही ! आम्ही कधी आपणांस लबाड पावलो नाही. आपण फर्माविले की, तर मग मी तुम्हांस एका मोठ्या शिक्षेपासून भिवविण्यासाठी आलो आहे. (जर तुम्ही कुफ्र, आणि शिर्कमध्ये व्यस्त राहिले) हे ऐकून अबुलहबने म्हटले तुझा नाश होवो ! काय तूंआम्हांस याचसाठी गोळा केले होतेस! ज्यावर अल्लाहतआलाने हा अध्याय अवतरित केला. (स.बुखारी) अबुलहबचे खरे नांव अब्दुल उज्जा होते. आपले रुप सौंदर्य आणि चेहऱ्याच्या लालीमुळे त्याला अबुलहब म्हटले जात होते. याशिवाय परिणामाच्या अनुषंगाने सुद्धा त्याला नरकाग्नीचे इंधन बनणे होते. हा नबी ﷺ चा खराखुरा चुलता होता. परंतु त्यांचा फारच कडक शत्रु होता. आणि त्याची पत्नी उम्मे जमील बिन्ते हरब पण शत्रुत्वांत आपल्या नवऱ्यापेक्षा कमी नव्हती.

१) 'यदा' हात आहे. अभिप्रेत याच्याने त्याचा जीव आहे. म्हणजे (त्याचा) नाश होवो ! हा शाप, त्या शब्दांच्या उत्तरांत आहे, जे त्याने नबी ﷺ शी संबंधित, राग आणि शत्रुत्वात म्हटले होते. व 'तब्ब' (आणि तो नाश पावला) ही बातमी आहे. म्हणजे शापाबरोबरच अल्लाहने त्याच्या नाश पावण्याची आणि बर्बादीची खबर देऊन दिली. म्हणूनच बद्रच्या युद्धाच्या थोड्याच दिवसानंतर हा आजारी पडला. ज्यांत प्लेगासारखी गांठ निघते. त्यांतच त्याचा मृत्यू झाला. तीन दिवसांपर्यंत त्याचे प्रेत असेच पडून राहिले. येथपावेतो की, त्याच्यातून फारच दुर्गंध येऊ लागला. सरतेशेवटी त्याच्या मुलांनी आजार पसरण्याच्या आणि लाजेच्या भीतीने, त्याच्या शरीरावर दुरूनच दगड आणि माती टाकून त्याला पुरुन टाकले. (अयसरत् तफासीर)

२) कमाईमध्ये त्याचा श्रीमंती थाटमाट आणि मानमर्तबा आणि त्याची संतती सुद्धा शामील आहे. म्हणजे जेव्हा अल्लाहची पकड झाली, तर यापैकी कुठलीही गोष्ट त्याच्या काही कामा आली नाही.

३) म्हणजे नरकाग्नीत ही आपल्या नवऱ्याच्या आगीत लांकडे आणून टाकीन; जेणेकरून आग आणखी भडकावी. हे अल्लाहकडून होईल. म्हणजे ज्याप्रमाणे जगांत आपल्या नवऱ्याच्या कुफ्र आणि अहंकारात मददगार होती, परलोकांत सुद्धा शिक्षेत त्याची मददगार होईल. (इब्ने कसीर) काही म्हणतात की, ती कांटेदार झाडी वाहून वाहून आणी, आणि नबी ﷺ च्या मार्गांत आणून अंथरून देई. आणि काही म्हणतात की, हा तिच्या चुगलखोरीकडे इशारा आहे. चुगलखोरी करीता ही अरबी म्हण आहे. ही कुरैशच्या काफिरांजवळ जाऊन, नबी ﷺ ची निंदा करी. आणि त्यांना आपल्या ﷺ अदावतवर उभारत होती. (फत्हुल बारी)

४) 'जीदुन' म्हणजे मान 'मसद', म्हणजे मजबुत पीळ दिलेली दोरी. ती नारळाची किंवा खजुरींच्या तंतुची असो, किंवा लोखंडी तारांची. जसा की वेगवेगळ्या लोकांनी याचे भाषांतर केले आहे. काहींनी म्हटले आहे की, ही ती जगांत गळ्यांत टाकून ठेवत असे, जिला सांगण्यात आले आहे. परंतु जास्त बरोबर ती गोष्ट वाटते की नरकाग्नीत तिच्या गळ्यांत जो मानखोडा असेल तो लोखंडी तारांनी पीळ दिलेला असेल. 'मसद' ने उपमा, त्याच्या तीव्र आणि

## (११२) सू. इखलास

महावाक्ये ४ — रुकूअ १

(١١٢) سُوْرَةُ الْاِخْلَاصِ مَكِّيَّةٌ (٢٢) — اٰيَاتُهَا ٤ — رُكُوْعُهَا ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

**आपण सांगून द्या की, तो अल्लाहतआला एकच आहे.** (१) — قُلْ هُوَ اللّٰهُ اَحَدٌ ۚ﴿١﴾

**अल्लाहतआला निरपेक्ष आहे.** (1) (२) — اَللّٰهُ الصَّمَدُ ۚ﴿٢﴾

**न त्याच्यापासून कोणी जन्मला; न तो कोणापासून जन्मला** (2) (३) — لَمْ يَلِدْ ۙ وَلَمْ يُوْلَدْ ۙ﴿٣﴾

**आणि न त्याच्या सारखा कोणी आहे.** (3) (४) — وَلَمْ يَكُنْ لَّهٗ كُفُوًا اَحَدٌ ﴿٤﴾

## (११३) सू. फलक

महावाक्ये ५ — रुकूअ १

(١١٣) سُوْرَةُ الْفَلَقِ مَكِّيَّةٌ (٢٠) — اٰيَاتُهَا ٥ — رُكُوْعُهَا ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

**आपण सांगून द्या की, मी सकाळच्या पालनकर्त्याचा आश्रय मागतो.** (4) (१) — قُلْ اَعُوْذُ بِرَبِّ الْفَلَقِ ۙ﴿١﴾

**प्रत्येक त्या वस्तुंच्या अपायापासून जी त्याने निर्माण केली आहे.** (5) (२) — مِنْ شَرِّ مَا خَلَقَ ۙ﴿٢﴾

**आणि काळोख्या रात्रीच्या अपायापासून, जेव्हा की अंध:कार पसरून जाईल.** (6) (३) — وَمِنْ شَرِّ غَاسِقٍ اِذَا وَقَبَ ۙ﴿٣﴾

**आणि गांठी मारून त्यांत फुंकणारीच्या अपायापासून (सुद्धा)** (7) (४) — وَمِنْ شَرِّ النَّفّٰثٰتِ فِى الْعُقَدِ ۙ﴿٤﴾

**आणि हेवा करणाऱ्याच्या अपायापासून सुद्धा जेव्हा तो हेवा करील.** (8) (५) — وَمِنْ شَرِّ حَاسِدٍ اِذَا حَسَدَ ﴿٥﴾

## (११४) सू. नास

महावाक्ये ६ — रुकूअ १

(١١٤) سُوْرَةُ النَّاسِ مَكِّيَّةٌ (٢١) — اٰيَاتُهَا ٦ — رُكُوْعُهَا ١

परम दयाळू आणि कृपाळू अल्लाहच्या नावाने मी आरंभ करतो

بِسْمِ اللّٰهِ الرَّحْمٰنِ الرَّحِيْمِ

**आपण सांगून द्या की, लोकांच्या पालनकर्त्याचा आश्रय मागतो.** (9) (१) — قُلْ اَعُوْذُ بِرَبِّ النَّاسِ ۙ﴿١﴾

**लोकांच्या बादशाहचा** (10) (२) — مَلِكِ النَّاسِ ۙ﴿٢﴾

**(आणि) लोकांच्या उपास्यांचा (आश्रय मागतो)** (11) (३) — اِلٰهِ النَّاسِ ۙ﴿٣﴾

**दुष्ट विचार ध्वनीत करणाऱ्या, मागे हटणाऱ्यांच्या अपायांपासून** (12) (४) — مِنْ شَرِّ الْوَسْوَاسِ ۙ الْخَنَّاسِ ۙ﴿٤﴾

**जो लोकांच्या उरांत दुष्ट विचार टाकतो.** (५) — الَّذِىْ يُوَسْوِسُ فِىْ صُدُوْرِ النَّاسِ ۙ﴿٥﴾

**मग तो जिन्नातांमधून असो किंवा मनुष्यांमधून** (13) (६) — مِنَ الْجِنَّةِ وَالنَّاسِ ﴿٦﴾

✿ हा संक्षिप्तसा अध्याय, मोठे महात्म्य बाळगतो. त्याला नबी ﷺ नी एक तृतियांश १/३ कुरआन ठरविले आहे. आणि त्याला रात्री पढण्याला प्रोत्साहन दिले आहे. (अल्‌बुखारी) काही सहाबा प्रत्येक रकातीत, दुसऱ्या अध्यायाबरोबर याला पण जरूर पढत असत. ज्यावर नबी ﷺ नी फर्माविले, ''तुमचे याच्याशी प्रेम, तुम्हास स्वर्गांत दाखल करून देईल.'' (अल्‌बुखारी,स.मुस्लिम) याच्या अवतरणाचे कारण हे सांगण्यात आले आहे की, मुशरिक लोकांनी रसूलुल्लाह ﷺ ला म्हटले की, आपल्या पालनकर्त्यांची वंशावळ वर्णन करा. (मुसनद अहमद, १३३/१३४-५)

१) म्हणजे सर्व त्याचे गरजवंत आहेत; तो कोणाचा गरजवंत नाही.

२) म्हणजे न त्याच्यापासून कोणी वस्तू निघाली न तो कोण्या वस्तुपासून निघाला आहे.

३) त्याच्या व्यक्तीत्वांत न त्याच्या वैशिष्ट्यांत न त्याच्या कृतीत. ''त्याच्या सारखी कोणती वस्तूंनाही.'' (सू.शूरा-११) हदीस कुदसीमध्ये आहे की, अल्लाहतआला फर्माविती, ''मनुष्य मला शिवी देतो, म्हणजे माझ्या

करीता संतती सिद्ध करतो. वास्तविक मी एक आहे. निरपेक्ष आहे, न मी कोणाला जन्म दिला न मी कोणापासून जन्माला आलो. न कोणी माझ्या सारखा आहे.'' (स.बुखारी) या अध्यायात त्यांचे पण खंडन होऊन गेले, जे अनेक परमेश्वरांना मान्यता देतात. आणि त्याचे सुद्धा जे अल्लाहची संतती सिद्ध करतात. त्याचे पण जे दुसऱ्यांना सरकतदार ठरवितात. आणि त्याचेपण जे अल्लाहतआलाचे अस्तित्वच मान्य करीत नाही.

४) 'फलक' चा अर्थ सकाळचा आहे. सकाळचे वैशिष्ट्य यासाठी की, ज्याप्रमाणे अल्लाहतआला रात्रीचा अंध:कार संपवून, दिवसाचा प्रकाश आणूंशकतो, तो अल्लाहतआला अशाच प्रकारे भय आणि दहशतीला दूर करून, आश्रय मागणाऱ्याला अभयपण देऊं शकतो. किंवा मनुष्य ज्याप्रमाणे रात्री या गोष्टीची प्रतीक्षा करतो की, सकाळी उजाडून जाईल. अशा प्रकारे भयभीत मनुष्य आश्रयाच्या मार्फत, साफल्याच्या सकाळची आशा बाळगून असतो. (फत्हुल कदीर)

५) हे सर्व साधारण आहे. याच्यात शैतान आणि त्याची संतती, नरकाग्नी, आणि प्रत्येक ती गोष्ट ज्यापासून मनुष्याला नुकसान पोहचूंशकते (पनाह) आश्रय मागितला गेला आहे.

६) रात्रीच्या अंधारातच धोकादायक जंगली श्वापदे, आपल्या वस्तीस्थानातून आणि विषारी प्राणी आपल्या बिळांतून आणि अशाच प्रकारे गुन्हेगारी करणारी माणसे, आपल्या तिरस्करणीय इराद्यांना कृतीत उतरविण्यासाठी, बाहेर निघतात, या शब्दांमार्फत या सर्वांकडून आश्रय मागितला गेला आहे. 'गासिक', रात्र 'वक़ब', दाखल होऊन जाईल, आच्छादून जाईल.

७) 'नफ्फासात' म्हणजे गांठीमध्ये फुंकणाऱ्या जिवांच्या अपायापासून पनाह. याच्याने अभिप्रेत जादुचा काळा अंमल करणारे पुरुष आणि स्त्रिया दोन्ही आहेत. म्हणजे याच्यात जादूगिराच्या खोडसाळपणापासून आश्रय मागितला गेला आहे. जादूगीर पढून पढून फुंक मारतात आणि गांठी मारत जातात. सर्व साधारणपणे ज्याच्यावर जादू करावयाचा असतो, त्याचे केस किंवा काही वस्तू मिळवून यावर हा अंमल केला जातो.

८) हेवा हा आहे की, हेवेखोर ज्याचा तो हेवा करतो त्याच्यापासून सुद्धा देणगी काढून घेतली जावो अशी आकांक्षा करतो. म्हणून त्याच्यापासून पण पनाह मागितली गेली आहे. कारण हेवा करणे हा सुद्धा एक चारित्र्य विषयक रोग आहे. जो पुण्याला खाऊन टाकतो.

✪सू. फलकच्यानंतर सू.नास आहे. दोहोंचे एकत्र महात्म्य, अनेक हदीशींमध्ये सांगितले गेले आहे. उदाहरणार्थ एका हदीशीमध्ये नबी ﷺ नी फर्माविले, ''आजच्या रात्रीत माझ्यावर काही अशी महावाक्ये अवतरीत झाली आहेत, ज्यांच्यासारखी मी कधी पाहिली नाही.'' असे सांगून आपण ﷺ नी हे दोन्ही अध्याय म्हटले. (स.मुस्लिम) अबु हाबीस जुहनी رضي الله عنه ला आपण फर्माविले, ''हे अबु हाबीस! काय मी तुला सर्वात उत्तम ताईत दाखवू नको, ज्याच्या मार्फत आश्रय मागणारे आश्रय मागतात?'' त्यांनी विनंती केली, होय! अवश्य दाखवा! आपण ﷺ नी दोन्ही अध्यायांचा उल्लेख करून फर्माविले हे दोन्ही मुऔवजतान' आहेत. (स.निसाई) नबी ﷺ, मनुष्ये आणि जिन्नातांच्या नजर लागण्यापासून आश्रय मागित असत. हे जेव्हा दोन्ही अध्याय अवतरीत झालेत, तेव्हा आपण यांना पढण्याची आपली नेहमीची पद्धत बनवून घेतली आणि बाकी दुसऱ्या गोष्टी सोडून दिल्या. (तिर्मिझी) ह.आयेशा رضي الله عنها फर्मावितात, जेव्हा आपणांस ﷺ काही त्रास होई, तेव्हा 'मुऔवजतैन' (कुल् आऊजु बि रब्बील फलक आणि कुल आऊजु बि रब्बी न्नास) पढून आपल्या शरीरावर फुंकून घेत. जेव्हा आपण ﷺ चा त्रास जास्त होऊन गेला, तर मी हे अध्याय पढून, आपल्या हात बरकतच्या आशेने, आपल्या शरीरावर फिरवी. (स.बुखारी,स.मुस्लिम) जेव्हा नबी ﷺ वर जादू करून देण्यात आला, तेव्हा ह.जिब्रईल عليه السلام हेच दोन अध्याय घेऊन हजर झाले आणि फर्माविले की, एका यहूदीने आपल्यावर जादू केला आहे आणि हा जादू अमुक विहीरीत आहे. आपण ﷺ नी ह.अली رضي الله عنه ला पाठवून त्याला मागविले (हे एका कंगव्याचे दाते आणि केसांबरोबर एका तातच्या दोरीला अकरा गांठी मारलेल्या होत्या. आणि मेणाचा एक पुतळा होता. ज्यांत सुया टोचलेल्या होत्या) जिब्रईल عليه السلام च्या हुकूमाप्रमाणे आपण ﷺ या दोन्ही अध्यायामधून एक एक महावाक्य पढत जात आणि एक एक गांठ उघडत जाई आणि सुई निघत जाई. शेवटापर्यंत पोहचता पोहचता, सर्व गांठी पण उघडून गेल्या आणि सुयापण निघून गेल्या. आणि आपण ﷺ अशाप्रकारे बरोबर होऊन गेलेत, जसा कोणी मनुष्य जकडलेल्या अवस्थेतून मुक्त होऊन जावा. (स.बुखारी, स. मुस्लिम) आपली ﷺ ही नेहमीची पद्धत पण होती, की रात्री झोपते वेळेस, सू.इखलास व मुअव्वीजतैन, पढून आपल्या तळहातावर फुंक मारीत, मग त्यांना साऱ्या

शरीरावर फिरवित. पहले डोके, चेहरा, आणि शरीराच्या पुढील भागावर हात फिरवित. याच्यानंतर जेथ पावेतो आपले हात पोहचत. तीन वेळा आपण असे करीत. (स.बुखारी)

एक आणखी हदीस आहे, जिच्यांत येते की, नबी ﷺ ला नमाजीत विंचवाने चाऊन घेतले. नमाजीतून मोकळे झाल्यानंतर आपण ﷺ नी मीठ आणि पाणी मागवून त्यावर मसळले आणि त्याच्या बरोबरच 'कुल् या अय्युहल काफिरुन, कुलहु अल्लाहू अहद कुल आऊजु बि रब्बीन नास, पढत राहिले.' (मजमुअल जवाईद)

९) 'रब्ब' (पालनकर्ता) चा अर्थ आहे, जो सुरवातीपासूनच जेव्हा की मनुष्य आपल्या आईच्या पोटांतच असतो, त्याचे नियोजन आणि सुधारणा करतो. येथ पावेतो की तो वयांत येऊन जातो आणि अक्कलवाला होऊन जातो. मग तो हे नियोजन काही खास माणसांकरीताच करतो असे नाही. किंबहुना सर्व मनुष्य मात्रांकरीता करतो आणि सर्व मनुष्यजातीसाठीच नव्हे तर आपल्या संपूर्ण सृष्टीसाठी करतो. येथे फक्त मनुष्यांचा उल्लेख करुन मनुष्याच्या त्याच्या प्रतिष्ठा आणि श्रेष्ठत्वाच्या जाहीर करण्यासाठी आहे. जे सर्व सृष्टीत त्याला प्राप्त आहे.

१०) जे व्यक्तीत्व, सर्व मनुष्यांचे पालनपोषण आणि त्यांची काळजी घेणारे आहे. तोच या गोष्टीला लायक आहे की, साऱ्या ब्रम्हांडाची सत्ता आणि बादशाही (राज्य) पण त्याच्याच हातात असावी.

११) आणि जो साऱ्या विश्वाचा पालनकर्ता असावा. साऱ्या ब्रम्हांडावर त्याचेच राज्य असावे, तेच व्यक्तीत्व या गोष्टीला पात्र आहे की, त्याचीच उपासना केली जावी. आणि तोच सर्व लोकांचा उपास्य असावा. म्हणून मी या महान आणि श्रेष्ठ व्यक्तीत्वाचा आश्रय मागतो.

१२) वसवसा गुप्त आवाजाला म्हणतात. शैतानसुद्धा फारच जाणीव होणार नाही अशा रीतीने मनुष्याच्या मनांत वाईट गोष्ट टाकून देतो. त्याला वसवसा म्हटले जाते. अल् खन्नास (मागे हटून जाणारा) हे शैतानाचे वैशिष्ट्य आहे. जेव्हा अल्लाहचे स्मरण केले जाते. तेव्हा तो तेथून दूर होऊन जातो. आणि अल्लाहच्या स्मरणाकडून जर गाफील होऊन जाईल तर तो मनावर आच्छादून जातो.

१३) हे वसवसा टाकणाऱ्यांचे दोन प्रकार आहेत. शयातिन आणि जिन्नांना तर अल्लाहतआलाने माणसांना बहकविण्याचे सामर्थ्य देऊन ठेवले आहे. याशिवाय प्रत्येक मनुष्याबरोबर एक शैतान त्याचा साथीदार असतो. जो त्याला बहकवत असतो. म्हणून हदीसमध्ये येते की, नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लमनी जेव्हा ही गोष्ट सांगितली तेव्हा सहाबांनी विचारले की हे रसूलुल्लाह्! काय तो आपल्या बरोबर सुद्धा आहे? आपण फर्माविले, होय ! माझ्या बरोबर पण आहे. परंतु अल्लाहने त्याच्यावर माझी मदत केली आहे आणि तो माझा आज्ञांकीत होऊन गेला आहे. मला भलाई शिवाय कोण्या गोष्टीचा हुकूम देत नाही. (स.मुस्लिम) अशाच प्रकारे हदीसमध्ये येते की, नबी सल्लल्लाहू अलैहि व सल्लम एतेकाफ करीत होते की, आपली पवित्र पत्नी हजरत सफिया رضي الله عنها आपल्याला भेटण्यासाठी आल्यात. रात्रीची वेळ होती. आपण त्यांना सोडण्यासाठी त्यांच्या बरोबर गेले. रस्त्यात दोन अन्सारी सहाबी तेथून गेले. तेव्हा आपण त्यांना बोलावून सांगितले की, या माझ्या पत्नी सफिय: बिन्ते हुय्य आहेत. त्यांनी अर्ज केला या रसूलुल्लाह ! आपल्या बाबतीत आम्हास कसा वाईट गुमान होऊं शकला असता? आपण फर्माविले की हे तर ठीक आहे. परंतु शैतान माणसांच्या शिरांत, रक्ताप्रमाणे धांवतो. मला धोका जाणवला की, कोठे तो तुमच्या मनांत काही शंका न टाकून देवो ! (स.बुखारी)

दुसरे शैतान मनुष्यांमधून असतात; जे उपदेशक, मेहेरबान रुपांत माणसाला बहकण्याला प्रोत्साहन देतात. काही म्हणतात की, शैतान ज्यांना बहकवितो. हे याचे दोन प्रकार आहे. म्हणजे शैतान माणसाला पण बहकवितो, आणि जिन्नतांना पण. फक्त मनुष्यांचा उल्लेख तगलीब म्हणून आहे. नाहीतर जिन्नांत सुद्धा शैतानांच्या वसवश्यांनी बहकून जाणाऱ्यांमध्ये शामील आहेत. आणि काही म्हणतात की, जिन्नांवर सुद्धां, कुरआनांत 'रिजाल' चा शब्द बोलला गेला आहे. (सू. जिन्न-६) म्हणून ते सुद्धा या बाबतीत मनुष्यांसारखेच आहेत.

# अध्यायांची (सूरहची) सूची

# अध्यायांची (सूरहची) सूची

# رُموزِ اوقافِ قرآن مجید

ہر ایک زبان کے اہلِ زبان جب گفتگو کرتے ہیں تو کہیں ٹھہر جاتے ہیں کہیں نہیں ٹھہرتے۔ کہیں کم ٹھہرتے ہیں کہیں زیادہ اور اس ٹھہرنے اور نہ ٹھہرنے کو بات کے صحیح بیان کرنے اور اس کا صحیح مطلب سمجھنے میں بہت دخل ہے۔ قرآن مجید کی عبارت بھی گفتگو کے انداز میں واقع ہوئی ہے۔ اسی لئے اہلِ علم نے اس کے ٹھہرنے نہ ٹھہرنے کی علامتیں مقرر کر دی ہیں جن کو رُموزِ اوقاف قرآن مجید کہتے ہیں ضرور ہے کہ قرآن مجید کی تلاوت کرنے والے اِن رُموز کو ملحوظ رکھیں اور وہ یہ ہیں۔

○ جہاں بات پوری ہو جاتی ہے، وہاں چھوٹا سا دائرہ بنا دیا جاتا ہے۔ یہ حقیقت میں گول ت ہے جو بصورت ۃ لکھی جاتی ہے۔ اور یہ وقفِ تام کی علامت ہے۔ یعنی اس پر ٹھہرنا چاہئے۔ اب ۃ تو نہیں لکھی جاتی چھوٹا سا حلقہ ڈال دیا جاتا ہے۔ اِس کو آیت کہتے ہیں۔

مـ یہ علامت وقفِ لازم کی ہے۔ اِس پر ضرور ٹھہرنا چاہئے۔ اگر نہ ٹھہرا جائے تو احتمال ہے کہ مطلب کچھ کا کچھ ہو جائے۔ اس کی مثال اردو میں یوں سمجھنی چاہئے کہ مثلاً کسی کو یہ کہنا ہو۔ کہ اُٹھو۔ مت بیٹھو۔ جس میں اٹھنے کا امر اور بیٹھنے کی نہی ہے۔ تو اٹھو پر ٹھہرنا لازم ہے۔ اگر ٹھہرا نہ جائے تو "اٹھو مت بیٹھو" ہو جائے گا۔ جس میں اٹھنے کی نہی اور بیٹھنے کے امر کا احتمال ہے۔ اور یہ قائل کے مطلب کے خلاف ہو جائے گا۔

ط وقفِ مطلق کی علامت ہے۔ اِس پر ٹھہرنا چاہئے۔ مگر یہ علامت وہاں ہوتی ہے جہاں مطلب تمام نہیں ہوتا۔ اور بات کہنے والا ابھی کچھ اور کہنا چاہتا ہے۔

ج وقفِ جائز کی علامت ہے۔ یہاں ٹھہرنا بہتر اور نہ ٹھہرنا جائز ہے۔

ز علامت وقفِ مجوّز کی ہے۔ یہاں نہ ٹھہرنا بہتر ہے۔

ص علامت وقفِ مرخّص کی ہے۔ یہاں ملا کر پڑھنا چاہئے لیکن اگر کوئی تھک کر ٹھہر جائے تو رخصت ہے معلوم رہے کہ ص پر ملا کر پڑھنا ز کی نسبت زیادہ ترجیح رکھتا ہے۔

صلے اَلْوَصْلُ اَوْلٰی کا اختصار ہے۔ یہاں ملا کر پڑھنا بہتر ہے۔

ق قِیْلَ عَلَیْہِ الْوَقْفُ کا خلاصہ ہے۔ یہاں ٹھہرنا نہیں چاہئے۔

صل قَدْ یُوْصَلُ کی علامت ہے۔ یہاں کبھی ٹھہرا بھی جاتا ہے کبھی نہیں لیکن ٹھہرنا بہتر ہے۔

قف یہ لفظ قِف ہے جس کے معنٰی ہیں ٹھہر جاؤ۔ اور یہ علامت وہاں استعمال کی جاتی ہے جہاں پڑھنے والے کے ملا کر پڑھنے کا احتمال ہو۔

س یا سکتہ سکتے کی علامت ہے۔ یہاں کسی قدر ٹھہر جانا چاہئے مگر سانس نہ ٹوٹنے پائے۔

وقفہ لمبے سکتے کی علامت ہے۔ یہاں سکتے کی نسبت زیادہ ٹھہرنا چاہئے لیکن سانس نہ توڑے۔ سکتے اور وقفے میں فرق یہ ہے کہ سکتے میں کم ٹھہرنا ہوتا ہے۔ وقفے میں زیادہ۔

لا لا کے معنٰی نہیں کے ہیں۔ یہ علامت کہیں آیت کے اوپر استعمال کی جاتی ہے۔ اور کہیں عبارت کے اندر۔ عبارت کے اندر ہو تو ہرگز نہیں ٹھہرنا چاہئے۔ آیت کے اوپر ہو تو اختلاف ہے۔ بعض کے نزدیک ٹھہر جانا چاہئے۔ بعض کے نزدیک نہ ٹھہرنا چاہئے لیکن ٹھہرا جائے یا نہ ٹھہرا جائے اس سے مطلب میں خلل واقع نہیں ہوتا۔ وقف اُسی جگہ نہیں چاہئے جہاں عبارت کے اندر لکھا ہو۔

ك کَذٰلِکَ کی علامت ہے، یعنی جو رُمز پہلے ہے وہی یہاں سمجھی جائے۔